







आयुर्वेदीय महाकोश अर्थात्

# आयुर्वेदीय शब्दकोश



## संस्कृत–संस्कृत–मराठी प्रथम खण्ड (अ ते न)



# आयुर्वेदीय महाकोश

अर्थात्

# आयुर्वेदीय शब्दकोश

## संस्कृत-संस्कृत-मराठी प्रथम खण्ड
(अ ते न)

संपादक व भाषान्तरकार

आयुर्वेदाचार्य वेणीमाधवशास्त्री जोशी

आयुर्वेदविशारद नारायण हरी जोशी




१९६८

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ
मुंबई

# निवेदन

महाराष्ट्रराज्यसाहित्य व संस्कृति मंडळाच्या वतीने हा आयुर्वेदीयशब्दकोश निर्मित व संपादित झाला असून आता प्रकाशित होत आहे. भारताच्या प्राचीन संस्कृतीमध्ये अनेक भौतिक विज्ञाने व शास्त्रे निर्माण झाली. आयुर्वेद, गणित, ज्योतिष, धातुविद्या, वास्तुविद्या इत्यादि भौतिक विज्ञाने झाली त्या सर्वांत आयुर्वेद ही अति प्राचीन विद्या होय. या विद्येचा उगम मुख्यतः अथर्ववेदामध्ये झाला. त्यानंतर अनेक महर्षींनी मानवी जीवनाचा सर्वांगीण अभ्यास करून मानवीजीवन व मानवाभोवतालचे भौतिक विश्व यांच्या आघात–प्रत्याघाताचे अवलोकन करून ते समग्र जीवनविज्ञान आयुर्वेदांत मांडले. वनस्पती व त्यांचा रोगपरिहाराकरिता होणारा उपयोग एवढाच आयुर्वेदाचा विषय काही लोक समजतात, परंतु ते खरे नाही. मानवी शरिराचे व मनाचे स्वास्थ्य कसे कायम ठेवता येईल या उद्देशाने मानवी जीवनाचा, शरीरव्यापारांचा व मनोव्यापारांचाही विचार या शास्त्रात आलेला आहे. व्यापक अशी तत्वज्ञानात्मक बैठक महर्षींनी आयुर्वेदाला दिली आहे. रोगांची किंवा अस्वास्थ्याची कार्यकारणभाव-मालिका यात निश्चित केलेली आहे. शरीर, इंद्रिये व मन यांच्या स्वास्थ्याची अस्वास्थ्याचीही कार्यकारणभाव-मालिका यात निश्चित केलेली आहे. या दोन कार्यकारणभाव-मालिका अनुभवाने व प्रयोगाने निश्चित करीत असतांना कांही एक गृहीतकृत्येही यात मांडलेली आहेत. ह्या गृहीत-कृत्यांची आधुनिक विज्ञानातील गृहीतकृत्यांसारखी यथार्थता किंवा अयथार्थता शोधण्याची प्रक्रियाही या शास्त्रात सांगितलेली आहे.

आयुर्वेदातील त्रिदोष विचार, सप्तधातुविचार व मन आणि शरीर यांच्या परस्परावलंबित्वाचा विचार आयुर्वेदातील गृहीतकृत्यांमध्ये समाविष्ट होतो. त्या गृहीतकृत्यांची व्यवस्थित समीक्षा आधुनिक देहेंद्रिय-मनोविज्ञानाच्या प्रकाशात अजून झालेली नाही. आयु-र्वेदातील स्वास्थ्योपाय, रोगोपपत्ति व रोगपरिहारोप-पत्ति यांची समीक्षा करीत असता या गृहीत-कृत्यांचीही समीक्षा करणे अगत्याचे आहे. आधुनिक विज्ञानाची कसोटी लावून त्यात सत्य व असत्य किती हे निश्चित करणे अजून आवश्यक आहे.

या समीक्षेस आवश्यक असे संपूर्ण आयु-र्वेदाचे अध्ययन करण्यास हा कोश आवश्यक असा व महत्वाचा ठरेल यात आम्हास शंका नाही. एव-ढेच नव्हे तर अशा तऱ्हेचा व्यापक संदर्भग्रंथ अजूनपर्यंत कोणत्याही भाषेत झालेला नाही. आयुर्वेद व आधुनिक वैद्यकविद्येमध्ये निष्णात असलेले पंडित, आयुर्वेदाचे अध्यापक व विद्यार्थी या सर्वांना अत्यंत उपयोगी होणारा हा ग्रंथ त्यांच्या हाती देण्यास आम्हांस अत्यंत आनंद होत आहे. या कोशास "आयुर्वेदीय शब्दकोश" अशी जरी नम्र संज्ञा दिलेली असली तरी वस्तुतः हा कोश संपूर्ण अर्थाने आयु-र्वेदाचा विश्वकोश किंवा ज्ञानकोशच होय असे म्हणता येईल.

महाराष्ट्रराज्य साहित्य आणि संस्कृतिमंडळाने मराठी भाषेला विद्यापीठीय शिक्षणाचे माध्यम बनवि-ण्याचा एक व्यापक व विविध प्रकारचा कार्यक्रम आखला आहे. व तो कार्यवाहीत आणला जात आहे. त्याचेच हा कोश हे निश्चित प्रत्यंतर आहे. वैद्य श्री वेणीमाधवशास्त्री जोशी, श्री. वैद्य ना. ह. जोशी आणि त्यांचे इतर सहकारी श्री. वैद्य दत्तात्रेय शास्त्री जळूकर व वैद्य एकनाथशास्त्री काशीकर यांनी अत्यंत परिश्रम घेऊन या ग्रंथातील संस्कृत भागाचे पुनः संपादन आणि मराठी भाषांतर केले याबद्दल मंडळाच्या वतीने आम्ही त्यांचे आभार मानतो.

मुंबई
दिनांक २५-११-६८

**लक्ष्मणशास्त्री जोशी**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ.

# आयुर्वेदीय-शब्द-कोश

या आयुर्वेदीयशब्दकोशाच्या निर्मितीचा इतिहास असा आहे. पंधरा वर्षांपूर्वी मुंबई सरकारने नेमलेल्या आयुर्वेद-संशोधनमंडळाने आयुर्वेदीयशब्दकोश निर्माण करण्याचे ठरविले. आयुर्वेदीयशब्दकोशाची आयुर्वेद क्षेत्रात अत्यंत जरुरी होती. हा आयुर्वेदीय शब्दकोश तयार होण्यापूर्वी एकही शब्दकोश आयुर्वेदीय परिभाषेच्या साहाय्याने तयार झालेला नव्हता. "वैद्यकशब्दसिंधु" सारखा एखादा कोश प्रसिद्ध झाला होता. तथापि त्यांतील शब्दांना केवळ वैद्यक ग्रंथांचाच आधार होता असे नाही; शिवाय त्यांचा अर्थ देताना केवळ आयुर्वेदीय परिभाषा वापरली नव्हती.

आयुर्वेदाच्या विद्यालयीन शिक्षणाला सुरुवात होऊन ६० पेक्षा अधिक वर्षे झालीं असल्यामुळे त्या शिक्षण-क्रमात शिकविल्या जाणाऱ्या ग्रंथांचे निरनिराळे अर्थ समजण्यासाठी एखाद्या शास्त्रोक्त परिभाषेसह अर्थ सांग-णाऱ्या शब्दकोशाची नितांत गरज होती. विद्यालयात शिकविणाऱ्या शिक्षकांना, विद्यार्थ्यांना व शास्त्र परिशीलन करणाऱ्या शास्त्रज्ञांना याची उणीव फार भासत होती. अनेक सभा-परिषदांमध्ये, तसेच सरकारने नेमलेल्या कमि-ट्यांपुढे अशा कोशाची जोरदार मागणी होऊ लागली. या मागणीचा विचार करून "आयुर्वेदीय शब्दकोश" संस्कृत-मध्ये तयार करण्याचे निश्चित केले.

या शब्दकोशासाठी आयुर्वेदातील सुप्रसिद्ध ग्रंथ, तसेच आयुर्वेदीय औषधीकरणासाठी वापरले जाणारे ग्रंथ, म्हणून पुढील ग्रंथांच्या आधाराने आयुर्वेदीय शब्दकोश तयार करण्याचे ठरले.

| पुस्तकाचें नांव | लेखक | टीकाकार | प्रकाशन | प्रसिद्धी वर्ष. |
|---|---|---|---|---|
| १ चरकसंहिता | वैद्य जादवजी त्रिकमजी आचार्य | चक्रदत्त | निर्णयसागर प्रेस मुंबई २ | १९४१ |
| २ सुश्रुतसंहिता | वैद्य जादवजी त्रिकमजी आणि नारायण राम आचार्य | डल्हण | निर्णयसागर प्रेस, मुंबई २ | १९३८ |
| ३ अष्टांगसंग्रह | | | वैद्य तर्टे | |
| ४ अष्टांगहृदय | भिषगाचार्य हरिशास्त्री पराडकर वैद्य; अकोला | १ अरुणदत्त व २ हेमाद्रि | निर्णयसागर प्रेस, मुंबई २ | १९३९ |
| ५ काश्यपसंहिता (कौमारभृत्यप्रकरण) | सं. पं. हेमराज शर्मा, नेपाल | भिषगाचार्य पं. सत्यपाल शर्मा | चौखम्बा संस्कृत सीरिज बनारस— १ | १९५३ |
| ६ माधवनिदान | वैद्य जादवजी त्रिकमजी आचार्य | १ मधुकोष २ आतङ्क-दर्पण | निर्णयसागर प्रेस, मुंबई २ | १९५५ |
| ७ रसरत्नसमुच्चय | पं. हजारीलाल शुक्ल | | पं. हजारीलाल शुक्ल. | |
| ८ धन्वन्तरी–निघंटु राजनिघंटुसहित | | | आनंदाश्रम मुद्रणालय पुणें. | |

या कामाचे स्वरूप बोर्डाने निश्चित करताना अनेक शास्त्रज्ञांचा सल्ला घेतला होता. विशेषेकरून कै. वैद्य यादवजी त्रिकमजी आचार्य, कै. वैद्य गणेशशास्त्री जोशी, हकीम दलजितसिंह चुनार, मिर्झापूर, (उत्तरप्रदेश) वैद्य जीवराम कालीदास, गोंडल; डॉ. प्राणजीवनदास मेहता, जामनगर; डॉ. घाणेकर ( बनारस ) इत्यादींचे मार्गदर्शन या कामामध्ये मिळाल्यामुळे कार्यपद्धति निश्चित करण्यास सुकर झाले.

या कोशाचे स्वरूप, सर्व क्षेत्रांतील लोकांना उपयोगी पडेल, या दृष्टीने निश्चित करण्याचे ठरले.

ग्रंथांतील शब्द घेण्याची रीती पुढीलप्रमाणे ठरली—

| आयुर्वेदकोशः | |
|---|---|
| पदम् | अर्थः |
| उद्धरणम् | |
| दिनम् | ग्रन्थस्थानम् |
| लेखकः | परीक्षकः |

तसेच शब्दार्थ निश्चित करण्याबाबत पुढील संकेत निश्चित करण्यात आले.

१ ) ज्या शब्दांना आयुर्वेदात विशिष्ट अर्थ आहे असेच शब्द घ्यावेत, सामान्य संस्कृत शब्द रद्द करावेत.

२ ) एका शब्दाची जेवढी कार्डे असतील त्यांचा क्रम अर्थदृष्ट्या प्रथमतः तपासून घ्यावा.

३ ) कार्डावर करावयाच्या संपादकीय संस्करणासाठी तांबडी पेन्सिल किंवा शाई वापरावी.

४ ) जे कार्ड संपूर्णपणे रद्द करावयाचे असेल त्यावर उजव्या कोपऱ्यात फुली मारावी.

५ ) कार्डातील जो भाग मुद्रणप्रतीत घ्यावयाचा, त्याच्या खाली आडवी रेघ मारावी, रेघ रद्द करावयाची असल्यास तिच्यावर उभ्या रेघा माराव्यात.

६ ) शब्दाचे प्रथमान्त एकवचनी रूप बदलून मूळरूप द्यावे. त्याच्यापुढे लिंगनिर्देश करावा ( पु. स्त्री. न. )

७ ) ज्या शब्दात कांही वैशिष्ट्य असेल, त्याचे उद्धरण अवश्य द्यावे ( संदर्भासह ) व त्याच्या खाली रेघ मारावी.

८ ) एका शब्दाचे दोन किंवा अधिक अर्थ असल्यास प्रत्येक अर्थागणिक योग्य उद्धरण अवश्य द्यावे.

९ ) वनस्पतिवाचक शब्दाच्या अर्थात तिची देशभाषांतील नावे उपलब्ध होतील तेवढी देवनागरी लिपीत द्यावी-वनस्पतीच्या नावात भाषांचा क्रम व संक्षेप खालील प्रमाणे असावा.

१ ) म.— मराठी ( देवनागरी लिपी )
२ ) हिं.— हिंदी —,,—
३ ) गु.— गुजराथी —,,—
४ ) बं.— बंगाली —,,—
५ ) ता.— तामीळ —,,—
६ ) फा.— फारसी —,,—

१० ) संपादकीय संस्करण पुरे झाल्यावर कार्डावर शब्दाची व्युत्पत्ति शक्य असेल तेथे देण्यात यावी. व्युत्पत्ति देण्याचा कृत्रिम प्रयत्न करू नये.

११) सामासिक पदातील मुख्य पदाची व्युत्पत्ति पूर्वी दिली असेल तर सामासिक पदात तिची पुनरुक्ति करण्याची आवश्यकता नाही.

१२ ) मुद्रणप्रतीतील क्रम पुढीलप्रमाणे राहील :— शब्द, लिंग, व्युत्पत्ति, संस्कृत अर्थ, उपोद्बलक उद्धरण, शब्दाचा दुसरा अर्थ ( असल्यास ) उपोद्बलक उद्धरण, ( वनस्पति असल्यास देशी नावे ).

१३ ) मुद्रणप्रत तयार झाल्यानंतर तिच्यावर "टाईप" योजनेसाठी आवश्यक त्या खुणा कराव्या.

१४ ) सामासिक शब्दामध्ये प्रधान अवयवाला वर्तुळ करून हायफन देऊन पुढील अवयव जोडावा व अवयवाखाली लाल रेघ काढावी.

१५ ) मूळ ग्रंथात साक्षात असलेलाच शब्द कोशासाठी कार्डात लिहावा. ग्रंथात नसलेला नवा जोडशब्द तयार करून लिहू नये.

याप्रमाणे सर्व नियम व उपनियमांबाबत बोर्डाने चर्चा करून हे काम प्रत्यक्ष करण्याच्या दृष्टीने वैदिक संशोधन मंडळाच्या कार्यवाहांशी चर्चा केली, व आयुर्वेद

संशोधन मंडळाचा शब्दकोश विभाग, टिळकस्मारक-मंदिरात वैदिक संशोधन मंडळाच्या जागेत सुरू करण्याचे ठरले. त्यासाठी लागणारे कर्मचारी, लागणारी लेखनसामुग्री, छपाई, फर्नीचर, ग्रंथ, तज्ञांचे मार्गदर्शन, मंडळाच्या सभासदांची त्यावर देखरेख इत्यादी सर्व मंडळाच्या संपूर्ण खर्चाने सुरू करण्याचे ठरले. वैदिकसंशोधनमंडळाच्या जागेत हे काम होत असल्यामुळे वैदिकसंशोधनमंडळाला सुपरव्हिजन चार्जेस ( देखरेख शुल्क ) देऊन हे काम मंडळाने तेथे करून घेतले. त्या ठिकाणी ६४००० ( चौसष्ट हजार ) कार्डे तयार झाली व सुमारे ३५००० ( पस्तीस हजार ) शब्द संपादनासाठी तयार झाले. आयुर्वेदसंशोधनमंडळाच्या वाङ्मयसंशोधन विभागाने या संस्कृतमध्ये तयार केलेल्या कोशाची संपूर्ण तपासणी केली व बराचसा अपुरेपणा दिसल्यामुळे हे सर्व काम पुण्याहून मुंबईस आयुर्वेद संशोधन मंडळाच्या कार्यालयात आणले; व तेथे संशोधन मंडळाचे सदस्य वैद्य वेणीमाधवशास्त्री व वैद्य ना. ह. जोशी यांच्या देखरेखीखाली दोन साहाय्यक संशोधकांची नेमणूक करून हे काम क्रमशः परत तपासून योग्य त्या दुरुस्त्या करण्यास सुरुवात केली. हे काम आयुर्वेद संशोधन मंडळाचे अस्तित्व १।५।१९६१ ला संपेपर्यंत चालू होते. पुढे आयुर्वेद संशोधन मंडळाची सर्व कामे स्थगित केल्यामुळे हेही काम संपूर्ण स्थगित झाले. पुढे सरकारने हे काम पुन्हा चालू ठेवण्याबाबत वैद्य वेणीमाधव शास्त्री जोशी व वैद्य ना. ह. जोशी यांची GOVT. RESOLUTION NO. AVD 1161 / 36687 / H–16th FEB. 1962 प्रमाणे नेमणूक केली व परत त्या कामाची जुळवाजुळव व त्या कामाकडे लक्ष देण्यास सुरुवात झाली. परंतु तेथे योग्य तऱ्हेचा कर्मचारी वर्ग उपलब्ध नसल्यामुळे या कामाला योग्य तो वेग येऊ शकला नाही. आयुर्वेदसंशोधनमंडळ बंद झाल्याने या कामाचा व मंडळाच्या इतर कामाचा सर्वनाश ओढवेल आणि मंडळाने मेहनत घेऊन केलेल्या कामाची नावनिशाणीही राहाणार नाही; या आत्यंतिक काळजीने मंडळाचे माजी अध्यक्ष वैद्य गं. वि. पुराणिक यांनी त्या वेळचे आरोग्यमंत्री नामदार मधुकरराव चौधरी यांना पत्र लिहून या शब्दकोशाच्या संरक्षणाची जबाबदारी सरकारने स्वतः घेऊन अगर कोणाकडून करवून घेऊन हे दुर्मिळ काम नष्ट होऊ देऊ नये अशी विनंती केली. अधिक चर्चेत सदरचे काम साहित्यसंस्कृतिमंडळाला आपल्या कामात समाविष्ट करून घेता येते काय ? याची माहिती मिळवावी असे ठरले व त्याप्रमाणे साहित्य संस्कृति मंडळाचे अध्यक्ष तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्याशी सविस्तर चर्चा केल्यावर " हे काम साहित्यसंस्कृतिमंडळाला आपल्या कामात समाविष्ट करून घेता येईल, परंतु केवळ संस्कृतमध्ये तयार केलेल्या या कोशात मराठी भाषांतरही दिले पाहिजे या अटीवरच ! " असा अभिप्राय त्यांनी व्यक्त केला. त्याप्रमाणे ६।५।१९६३ रोजी हे स्थगित शब्दकोशाचे काम साहित्यसंस्कृतिमंडळाच्या ताब्यात द्यावे असा हुकूम नामदार आरोग्यमंत्र्यांनी दिला.

या हुकुमाप्रमाणे कोशाचे हस्तलिखित व इतर साहित्य साहित्यसंस्कृतिमंडळाकडे आले व मंडळाने पूर्वी काम करीत असलेल्याच वैद्य वेणीमाधवशास्त्री जोशी व वैद्य, ना. ह. जोशी यांना कोश तपासण्याचे काम चालू ठेवण्यास सांगितले.

साहित्यसंस्कृतिमंडळाच्या निर्णयाप्रमाणे सदर कोशाचे मराठी भाषांतरासह संपूर्ण संपादन वरील दोन्ही आयुर्वेदीय तज्ञांनी करावे असे साहित्यसंस्कृतिमंडळाने ठरविले. या दोन्ही तज्ञांनी पूर्वीच्या हस्तलिखितातील असंख्य दोष दुरुस्त केले, अनेक ठिकाणी नसलेला ग्रंथाधार शोधून तो जरूर त्या ठिकाणी दाखल केला. चुकीचे संदर्भ दुरुस्त केले, अपुरे अर्थ पूर्ण केले. ज्या ठिकाणी शब्दांचा क्रम बदलणे आवश्यक होते, त्या ठिकाणी ते क्रम बदलले. व्याकरणदृष्ट्या दिलेली व्युत्पत्ति, वैद्यकदृष्ट्या योग्य नसेल, त्या ठिकाणी वैद्यकदृष्ट्या योग्य ती ठेवली. यासाठी साहित्यसंस्कृतिमंडळाने जरूर तो कर्मचारी वर्ग नेमला. या दोन्ही संपादकांनी केलेल्या मराठी भाषांतरासह सर्व मजकुराचे परत

हस्तलिखित तयार करण्यात आले व त्याला साहित्य-संस्कृतिमंडळाने मान्यता दिली. त्यानंतर त्या कोशाचे छपाईचे काम कसे करावे याबाबत चर्चा होऊन हे काम निर्णयसागर प्रेसमध्ये छापावे, याच्या ३००० प्रती, संस्कृत-संस्कृत आणि २००० प्रती संस्कृत–संस्कृत–मराठी, छापाव्या असे ठरले. त्याप्रमाणे निर्णयसागर प्रेसमध्ये हे काम छापून पूर्ण करण्यात आले.

## कोशरचनेचे स्वरूप व प्रयोजन

आयुर्वेदीय शब्दकोश हाती घेण्यापूर्वी वाचकांची कल्पना त्या कोशात आयुर्वेदशास्त्रात असलेले पारिभाषिक शब्द आणि त्यांचे अर्थ एवढेच यात असणार, अशी असणे स्वाभाविक आहे. परंतु हा कोश प्रत्यक्ष उघडून पाहिल्यावर त्यांना आपल्या कल्पनेहून फारच वैशिष्टयपूर्ण असा हा कोश असल्याचे दिसून येईल. कारण केवळ शब्द आणि अर्थ ह्या कोशात दिलेले नाहीत तर कोशात आलेला प्रत्येक शब्द आयुर्वेदाच्या ज्या विभागात आलेला आहे त्याला अनुसरून त्या शब्दाने आयुर्वेदशास्त्रात व्यक्त होणाऱ्या कल्पनांचा परिपोष निरनिराळ्या ग्रंथाधारांनी केला असल्याचें वाचकांस आढळणार आहे. आयुर्वेदीय शब्दकोश हे ह्या कोशाचे नाव अगदी आरंभापासून शेवटपर्यंत आम्ही कायम ठेवले आहे हे जरी खरे असले तरी ग्रंथाचे संपूर्ण मुद्रण झाल्यावर एकंदर विस्तार लक्षात घेऊन 'आयुर्वेदीय महाकोश' हे नाव ह्या ग्रंथाला अधिक समर्पक ठरेल असे आम्हास वाटून तेच मागाहून दिले गेले आहे हे वाचकांच्या ध्यानी येईल व तेच सार्थ असल्याचे त्यांनाही पटेल असा आम्हाला विश्वास आहे. आमच्या म्हणण्याच्या पुष्टीसाठी त्या महाकोशातील कांही वैशिष्टे वाचकांच्या नजरेस आणणे इष्ट वाटते.

### मुख्य विषय

१ ) स्वास्थ्य म्हणजे आरोग्य, २ ) अस्वास्थ्य म्हणजे रोग, त्यांचे स्वरूप, लक्षणे व कारणमीमांसा, ३ ) स्वास्थ्यास व अस्वास्थ्यनिवारणास कारणीभूत औषधें, ४ ) अन्न आणि मानवी वर्तन व विहार, ५ ) शरिराचे घटक व त्यांचे व्यापार आणि ६ ) रोगनाशक उपचार. हे ६ विषय मुख्य असून त्यांना उपबृंहक अशा विषयांचेही शब्द त्यांच्या विवरणासह यामध्ये आलेले आहेत.

**उदाहरणार्थ**—

**स्वास्थ्य** — ह्या विभागात स्वस्थ शब्दाचा अर्थ, स्वस्थ पुरुष-लक्षण, तसेच निरनिराळे प्रकार व चिकित्सेनंतर प्राप्त होणारे स्वास्थ्य-लक्षण ह्यांचे विवेचन करणारे शब्द आले आहेत.

**अस्वास्थ्य** — ह्या विभागात रोगविवेचन विषयक शब्द आहेत. त्या विवेचनात विकाराचे नाव, त्याचे पर्यायवाचक शब्द, दोषादि दृष्टीने होणारे त्याचे प्रकार, रोगोत्पत्तीची कारणे, पूर्वरूपे, स्पष्ट लक्षणे, उपशयानुपशयविचार, साध्यासाध्यत्व, उपद्रव, रिष्ट लक्षणे, रोगनिवारक तात्त्विक चिकित्सा, रोगपुन्हा न होण्यासाठी करावयाचे उपचार व संपूर्ण रोगनिवृत्तिलक्षणे अशा गोष्टी दृष्टीपुढे ठेवून त्या त्या शब्दाखाली ती माहिती देण्याचा प्रयत्न केला आहे.

**औषधें – अन्न – मानवी वर्तन व विहार** – औषधवाचक शब्द, त्याचे पर्याय, गुणधर्म, उपयोगाच्या बाबतीत विधिनिषेध, औषधीद्रव्यांची शुद्धि व संस्कार असे विवेचन दिले गेले आहे.

**अन्न**—हे धान्य, फळे कंद मांस इ० स्वरूपातच असल्याने त्याचे गुणधर्मवाचक शब्द पर्यायासह दिले आहेत.

विहाराच्या दृष्टीने स्वास्थ्य व अस्वास्थ्य अशा दोन्ही अवस्थांना अनुसरून आचरणात आणावयाच्या नियमांचे वाचक शब्द ह्या विभागात विवेचनासह घेतले गेले आहेत.

वनस्पतींच्या बाबतींत त्या त्या वनस्पतींची पर्यायवाचक नावे व अर्थाला अनुसरून वनस्पतीचे स्वरूपदर्शक वर्णन दिले असून निरनिराळ्या प्रचलित भाषांतील नावेही दर्शविली आहेत.

रोगनाशक उपचार या दृष्टीने आलेल्या शब्दांचे वर्णन त्या उपचारांच्या प्रक्रियांसह दिलेले आहे.

**वर्णानुक्रम**

या कोशात वर्णानुक्रम लावताना नव्या पद्धतीचाच अवलंब केला आहे.

उदाहरणार्थ—'अ', 'आ' अशा वर्णानुक्रमे शब्दांचा प्रारंभ न करता 'अंश' शब्द प्रारंभी घेतला आहे. तसेच 'क्ष' वर्णाचे आद्याक्षरी शब्द 'क' नंतर आणि 'ज्ञ' चे 'ज' नंतर घेतले आहेत असे वाचकांस आढळेल.

**कोशाचे प्रयोजन**

१) आयुर्वेदीय विद्यार्थ्यांना त्या त्या संदर्भावरून विषयाचे आकलन सुलभ व्हावे.

२) आयुर्वेदीय अध्यापकांना अध्यापनाच्या दृष्टीने एकच विषय भिन्नभिन्न ग्रंथांतून कसा आला ह्याचा तुलनात्मक अभ्यास परिभाषा व पर्याय यांच्या टाचणावरून करून अध्यापन सुकर व्हावे.

३) इतर शास्त्रांच्या संशोधकांनाही आयुर्वेदाची 'शास्त्रीय तत्त्वे' व मुद्दे आपापल्या विषयास पोषक म्हणून पाहणे शक्य व्हावे.

४) आयुर्वेदव्यवसाय व इतर कोणत्याही शास्त्राचा अभ्यास नसलेल्या परंतु आयुर्वेद हा एक आवडीचा विषय म्हणून त्याचे नित्य परिशीलन करणाऱ्या विद्वानांनाही आयुर्वेदशास्त्राचा ज्ञानानंद अनुभवता यावा.

आतां आयुर्वेदाबद्दल थोडेसे निवेदन देणे इष्ट आहे.

**आयुर्वेद शब्दाची निरुक्ति—**

'आयुषः वेदः–' आयुर्वेदः आयुष्याचे ज्ञान म्हणजेच आयुर्वेद. याचा अर्थ हितकर, अहितकर, सुखी, दुःखी आयुष्य व त्याला हितकर व अहितकर काय यांचे ज्ञान असा होतो, अर्थात हितकर सेवन व अहितकर याग याकरताच या ज्ञानाची (आयुर्वेदाची) आवश्यकता आहे. "हिताहितं सुखं दुःखं आयुस्तस्य हिताहितं मानं च तस्य यत्रोक्तं आयुर्वेदः स उच्यते" ह्या शास्त्रीय वचनांतून हेच म्हटले आहे.

**आयुष्य म्हणजे काय?**

"शरीरेन्द्रियसत्वात्मसंयोगःआयुः" म्हणजेच शरीर, कर्मेंद्रिये, ज्ञानेंद्रिये, मन, आत्मा यांचा संयोग ज्या एका विशिष्ट कालावधीपर्यंत धारण केला जातो तो संपूर्ण कालावधी. धारि आणि जीवित अशी ह्याचीच दुसरी नावे होत.

आयुर्वेदीय तत्त्वानुसार चिकित्साधिष्ठान पुरुष हा २४ तत्त्वांचा मानला असून त्याला धारण करणारे शरीर हे पंचमहाभूतविकारात्मक आहे. त्या शरिराला होणाऱ्या सुखदुःखादि द्वंद्वात्मक संवेदनांचा भोक्ता व साक्षी आत्मा म्हटला गेला आहे. संपूर्ण विश्वात ओतप्रोत भरून असलेल्या विशाल व संपूर्ण अशा आत्मस्वरूपाचा अत्यल्प असा एक अंश देहामध्ये आत्मस्वरूपात अवतीर्ण झालेला आहे. ज्या अनंत ब्रह्मांडातून तो ह्या शरिरात आला, त्याच अनंत ब्रह्मांडात तो देहनाशानंतर पुनश्च विलीन होणार असून ह्या शरिराचेही पंचमहाभूतात्मक घटक शेवटी त्याच विशालस्वरूप पंचमहाभूतात विलीन व्हावयाचे आहेत. अवतीर्ण होण्याच्या ह्या स्थितीला जन्म आणि विलीनावस्थेला मृत्यु असे म्हटले जाते. अशा जन्म व मृत्यु ह्या दोन टोकांतील जे कालात्मक अंतर ते आयुष्य होय.

**निरामय दीर्घायुष्य म्हणजे काय?—**

आमय म्हणजे रोग किंवा दुःख! आत्मसंनिविष्ट शरिराशी दुःखाचा संयोग होणे म्हणजेच रोग होय! 'तद् दुःखसंयोगो व्याधिः' हीच व्याधि ह्या शब्दाची व्याख्या आहे. व्याधीलाच रोग किंवा पाप्मा म्हटले आहे. शरिराशी हा दुःखसंयोग न होणे हे जितक्या कालावधीपर्यंत लांबणीवर पडेल तोपर्यंत आयुष्य निरामय म्हणजे निरोगी असे लाभेल. परंतु जन्माबरोबरच पूर्वकर्माचे गाठोडे बरोबर घेऊन प्राणी जन्माला येत असल्याने जन्म म्हणजेच दुःख असे म्हटले जाते. क्षणाक्षणाला 'शीर्यते' म्हणजे

झिजते किंवा शरीरकर्मामुळे नाश पावते म्हणूनच देहाला शरीर हे नाव दिले गेले आहे. 'शीर्यते इति शरीरम् !'

**आयुर्वेदाचे परमोच्च उद्दिष्ट—**

निरामय दीर्घायुष्य संपादन केले म्हणजे मानवाची इतिकर्तव्यता संपली असे आयुर्वेदास संमत नाही; तर मानवजन्माचे सार्थक ऐहिक आणि पारलौकिक कल्याण साधन केल्यानेच होणार आहे. त्यालाच अभ्युदय आणि निःश्रेयस असेही म्हटले आहे. "मोक्षे निवृत्तिर्निःशेषा योगो मोक्षःप्रवर्तकः" असे आयुर्वेदप्रवर्तक ऋषींनी घोषित केले आहे. मोक्षसाधन जो योग तोच मानवाचे अंतिम उद्दिष्ट असले पाहिजे. जन्म म्हणजेच दुःख हे पूर्वी सांगितले आहेच. अर्थातच त्या दुःखांतून मुक्त होणे म्हणजेच जन्ममरणाच्या चक्रांतून सुटणे होय; व या दृष्टीनेच दुःखाचा आत्यंतिक नाश हाच मोक्ष होय अशी त्याची व्याख्या होऊं शकते.

पुरुषार्थचतुष्टय संपादनासाठी "आरोग्य" ही अत्यावश्यक अशी बाब आहे. आरोग्य नसताना एकही पुरुषार्थ मानव साधू शकणार नाही हे मुख्यतः आयुर्वेदाने आवर्जून सांगितले आहे. "धर्मार्थकाममोक्षाणां आरोग्यं मूलमुत्तमम्" हे आयुर्वेदीय शास्त्रसूत्र हेच सांगते.

**कालनिर्णय**

प्राचीन संहिताग्रंथांचा कालनिर्णय ही एक फार मोठी गुंतागुंतीची कठीण समस्या आहे. ग्रंथांचा काळ, मिती वगैरे लिहिणे व ग्रंथकाराने स्वतःचे नाव लिहिणे ही प्रथा प्राचीन काळी जवळजवळ आढळत नाही म्हटले तरी चालेल. विद्याग्रहण ज्या गुरूकडून केले त्या गुरूचा किंवा पित्याचा उल्लेख कोठे कोठे जरी आढळत असला तरी निरनिराळ्या काळात त्याच नावाचे महर्षि होऊन गेले असल्याने, व एकाच निरनिराळ्या शास्त्राच्या ग्रंथांचाही उल्लेख आढळत असल्याने आयुर्वेदशास्त्राचे ग्रंथकर्तृत्व कोणत्या नावाकडे दिले जावे हे कळत नाही. तसेच गोत्र किंवा सांप्रदायाचेंच नाव धारण करूनही ग्रंथरचनेची प्रवृत्ती असल्याने त्या गोत्रातील वा सांप्रदायातील कितव्या पिढीच्या पुरुषाने तेच नाव धारण करून ग्रंथरचना केली हे निश्चित समजणे शक्य होत नाही. ह्या व आणखीही अनेक अडचणींच्या कारणामुळे ग्रंथकर्त्यांच्या कालनिर्णयाविषयी जिज्ञासा उत्पन्न झालेल्या अनेक संशोधकांनी दूरान्वयाच्या संबंधावर निरनिराळी अनुमाने करून निरनिराळे निर्णय घेतलेले आढळतात. अशा अनुमानांच्या संकलनावर एखादा निर्णय निश्चयात्मक व्यक्त करावा लागतो. चरकाच्या कालनिर्णय करू म्हटल्यास ती एकच व्यक्ती नसून तो एक संप्रदाय होता, व त्यांचे अनुयायी आपणास 'चरक' म्हणवीत असत. यामुळे चरक या नावाचा आधार म्हणून उल्लेख करणारे ग्रंथकार 'इति चरकाः' असा उल्लेख करतांना आढळतात. यावरून अग्निवेश संहितेचा संस्कारकर्ता लेखक एक चरक होय एवढेच निश्चित होते. त्याचा कालनिर्णय हा एक इतिहाससंशोधनाचाच विषय आहे. त्यामुळे वेळोवेळी निरनिराळ्या संशोधक दृष्टीच्या लेखकांनी जे जे अभिप्राय कल्पनेने निवेदन केले आहेत त्यावरच अवलंबून राहून व त्यावरूनच सर्व साधारण कालनिर्णय त्या त्या संहिताग्रंथांबद्दल येथे नमूद करण्यांत येत आहे. प्रायः प्राचीन संहिता ग्रंथांच्याच कालनिर्णयाबद्दल हा अंदाज आहे. अर्वाचीन ग्रंथांबद्दलही अगदी निश्चित कांही सांगता येत नसले तरी इसवी सनाच्या कोणत्या शतकात ते ते ग्रंथकार झाले हे सांगता येते. या दृष्टीनेच ह्या कालनिर्णयाकडे पाहिले पाहिजे. चरक व सुश्रुत संहितांच्या प्रास्ताविक लेखात कै. वै. यादवजी आचार्य यांचे निवेदनच येथे आधार म्हणून मानले आहे.

१ अग्निवेश संहिता काल — प्रसिद्ध ज्योतिषशास्त्रसंशोधक कै. श्री. शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनी अनेक आधार देऊन तो इ. स. पूर्वी ३ हजार वर्षांचा सिद्ध केला आहे. इ. स. पूर्वी ८ शें वर्षांचा हा काल असल्याचे एका पाश्चात्य संशोधकाने म्हटले आहे.

२ सुश्रुत संहिता — वर लिहिलेल्या ज्योतिषशास्त्रसंशोधक कै. शं. बा. दीक्षित ह्यांनी सुश्रुत कालनिर्णय निवेदन करताना असे म्हटले आहे की, भारतात वारगणना प्रवृत्ती शकारंभाच्या अगोदर एक हजार वर्षां-

पूर्वी सुरू झाली असून त्याच काळात सुश्रुताची ग्रंथरचना झाली असली पाहिजे असे सिद्ध केले आहे. हेसलर नामक एका पाश्चात्य संशोधकानेंही ह्याच काल संमत केला आहे. इ. स. पूर्वी एक हजार असेच त्याचे मत आहे; तर हार्ले नामक दुसऱ्या एका संशोधकाने ह्याच काळ विक्रमीय शकापूर्वी ६ व्या शतकाचा ठरविला आहे.

३ वाग्भट---ह्या नावाचे २ संहिताकार झाले असे प्रसिद्ध आयुर्वेदीय ग्रंथ मालेचे प्रकाशक कै. यादवजी त्रिकमजी आचार्य यांनी अनेक संशोधनपूर्ण आधार देऊन सिद्ध केले आहे. ते अष्टांगसंग्रहकार वाग्भट याला वृद्धवाग्भट असे म्हणतात, वाहट असेही त्याचे एक नाव आहे. इसवी सन ६२५ च्या सुमारास हा ग्रंथकार होऊन गेला. आणि त्यानंतर ह्याच अष्टांगसंग्रह संहितेचे नातिसंक्षेप–विस्तर असे संकलन करून 'अष्टांगहृदय' संहिता करणारा वाग्भट हा ८ व्या शतकात झाला असे ते म्हणतात. यादवजींच्या स्वतःच्या मते वाग्भटाचा काल ६ व्या शतकाचा आहे. तर ज्ञानकोशकार कै. श्री. व्यं. केतकर ह्यांच्या ज्ञानकोशात हा काळ ८ व्या शतकाचा गृहीत धरला आहे.

४ काश्यपसंहिता–– कृतयुग संपून त्रेतायुगाच्या सुरुवातीला अधर्मप्रवृत्ती सुरू होऊन रोग वाढू लागून जनता त्रस्त होऊ लागली असता ब्रह्मदेवाच्या आज्ञेने कश्यपमुनींनी आपल्या ज्ञानदृष्टीने निर्माण केलेली काश्यपसंहिता ही आद्य संहिता समजली जाते. पुढे जीवक नामक एका पंचवर्षीय बालकाने त्या संहितेचे ग्रहण करून ऋषिजनांपुढे ठेविली. परंतु अल्पवयी बालकाने केलेल्या ह्या संहितेला ऋषींनी मान्यता दिली नाही. तेव्हां त्या जीवक बालकाने गंगाऱ्हदात कनखल क्षेत्रात अवगाहन केले व वृद्ध देह धारण केला. हा चमत्कार पाहिल्यावर मात्र त्या काश्यपसंहितेला वृद्धजीवकीय तंत्र असे नाव मिळाले. पुढे कलिप्रभावांत तेही तंत्र नष्ट होत असता अनायास नामक यक्षाने त्याचे ग्रहण केले व त्या अनायास यक्षाकडून वात्स्य नामक शिष्याने ते ग्रहण केले असा ह्या संहितेचा इतिहास आहे. वात्स्य हा वृद्ध जीवकीय वंशातील असल्याने हे तंत्र त्याने पुढे वृद्धजीवकीय तंत्र या नावानेच प्रचारित केले. तथापि मूळ कर्ता कश्यपमुनी असल्याचे ध्यानी घेऊन 'काश्यपसंहिता–वृद्धजीवकीय तंत्र' असे ह्या संहितेचे नामकरण झाले.

# संहिता वैशिष्ट्य

### चरक (अग्निवेश महर्षीविरचित)

उपलब्ध आयुर्वेदीय संहिताग्रंथांत अग्निवेशसंहिता ही एक अत्यंत प्राचीन संहिता म्हणून समजली जाते. त्यानंतर निरनिराळ्या ऋषीमहर्षींनीही संहिता रचना केल्याचे आढळते. अर्थातच त्या त्या संहिताकारांचे वैशिष्ट्य असणारच ! निरनिराळ्या संहिताकारांचे वैशिष्ट्य समजून घ्यावयास पाहिजे. त्या दृष्टीने प्रथमतः अग्निवेशसंहितेविषयी उल्लेख केला पाहिजे. कारण हीच संहिता पुढे चरक संहिता नावाने प्रसिद्धीस आली.

१) ह्या चरक संहितेत आयुर्वेदशास्त्रीय तत्त्वांची मांडणी अनेक दर्शनशास्त्रांच्या सिद्धांतांना अनुसरून केली आहे असे दिसून येते. सांख्यांनी पंचविंशति तत्त्वे मानली आहेत तर पुनर्वसुपरंपरेत चतुर्विंशति तत्त्वांचा पुरुषच मानला आहे.

२) मानवी जीवन शारीरिक व मानसिक असे द्विविध आहे. अशा उभय स्वरूपात आरोग्य संपन्न करणे आयुर्वेदाचे अंतिम उद्दिष्ट आहे आणि शारीरिक आरोग्य व मानसिक आरोग्य परस्परावलंबी आहे; या दृष्टीची आयुर्वेदाची विचारसरणी आहे. म्हणून जन्म म्हणजेच दुःख आणि मोक्षसाधन म्हणजे दुःखनाश! हे तत्त्व चिकित्सा प्रतिपादन करताना या संहितेत दृष्टीपुढे असलेले दिसते. चिकित्सेचे ४ विभाग कल्पिले आहेत. ते ४ विभाग म्हणजे (१) रोगनाशिनी चिकित्सा, (२) प्रकृतिस्थापनी

चिकित्सा ( ३ ) रासायनी, चिकित्सा ( ४ ) नैष्ठिकी चिकित्सा हे होत. ह्या ४ ही प्रकारांच्या निमित्त उत्तरोत्तर क्रमशः अधिकाधिक वरच्या प्रतीचे देह धातु मन यांचे प्रकृतित्व (समत्व) प्रस्थापित करण्याचे उपचार स्पष्ट दाखविले आहेत.

३ ) 'अतत्त्वाभिनिवेश' हा संशोधन संशमनादी रोगनाशनी आणि नैष्ठिक चिकित्सेने बरा होणारा विकार आचार्यांनी सांगितला आहे.

४) सप्तधातु व मन यांचा परस्परसंबंध सारासारत्वाच्या दृष्टीनें खोल असा विचार प्रथम अग्निवेशांनीच केला आहे.

५ ) धातूच्या सारासारत्वावरच मानसिक व इतरही कोणकोणत्या अमूर्त भावांचे श्रेष्ठ–कनिष्ठत्व अवलंबून आहे याचे यथायोग्य सविस्तर दिग्दर्शन आचार्यांनी केले आहे.

६ ) आशयापकर्ष होऊन सम दोषांमुळेही विकार होतात हे आचार्यांनी दाखविले व त्यावरील उपचारही सांगितले.

७ ) हेतुविपरीत, व्याधिविपरीत, हेतुव्याधिविपरीत, हेतुविपरीतार्थकारी, व्याधिविपरीतार्थकारी व हेतुव्याधिविपरीतार्थकारी अशी सहा प्रकारची मूलगामी चिकित्सा आचार्यांनी निवेदन केली आहे. यांतील शेवटच्या तीन प्रकारात दिसायला समान दिसत असूनही रोगशमनाचे इष्ट कार्य साधणाऱ्या चिकित्सेचे प्रतिपादन केले आहे.

८ ) मंडूर, लोह, शिलाजतु, सुवर्ण, वैडूर्य ( रत्न ), मणी व पारद यांचा उपयोग औषधीकार्यांत प्रथम आचार्यांनी प्रतिपादन केला आहे.

९ ) गूळ व मध हीं वनस्पतिजन्य व तूप हे प्राणिज द्रव्य अशी हीं तीन द्रव्ये आणि गूळ, साखर, मध ह्या तीन द्रव्यांनी तयार केलेले आसव हीं जितकी जुनी तितकी अधिक श्रेष्ठ व गुणावह होतात ही कल्पना यांचीच आहे.

१० ) सामाजिक स्वास्थ्याचाही विचार संहिताकाराच्या दृष्टीतून सुटला नाही. पृथ्वी, जल, वायु, इ०च्या विकृतीमुळेसुद्धा जनपदोध्द्वंसक रोग होतात व यांच्या विकृतीच्या अनेक कारणांपैकीच 'भूत' म्हणजे जंतु हेही कारण असल्याचे तसेच विकार न करणारे सहज कृमीही आचार्यांनी दर्शविले आहे.

११ ) मनुष्याच्या शरिरातील सर्व श्रेष्ठ उत्तमोत्तम घटक जो ओज धातु त्याला खाणाऱ्या सूक्ष्म भूतांची (जंतूंची) माहिती निराळीच सांगितली आहे. ते जंतु इतरजंतूंपेक्षा निराळेच होत असे श्रीअग्निवेश म्हणतात.

( १२ ) रोगनाशनापेक्षाही ते उत्पन्नच न व्हावे या दृष्टीने संहिताकारांनी विशेष लक्ष घालून कांही नियम सुचवले आहेत. (उदा०–लवण रसाचे सतत व अधिक सेवननाने रोग होतात ही गोष्ट) 'आहारसंभवं वस्तु रोगाश्च आहारसंभवा:' म्हणजे प्राण्याचा जन्म आहारापासून होतो आणि त्याला होणारे सर्व रोगसुद्धा आहारामुळे होतात हे सांगून आरोग्य–अनारोग्याच्या दृष्टीने आहार-विहारावर भर देऊन स्वास्थ्यरक्षण करण्यास सुचवले आहे.

१३ ) रुग्णांच्या भावभावनांचाही मानसिक दृष्ट्या विचार करून रोगनिरसनासाठी त्यांच्या मनातील श्रद्धा, भक्ती इ०चा उपयोग करण्यासंबंधीच्या अभ्यासपूर्ण सूचना आचार्यांनी दिल्या आहेत. वैदिक देवतांच्या उपासना, अग्नि, वायु, विष्णु, इंद्र, शंकर आदि देवतांच्या पूजन, अर्चन, प्रार्थनेचा उल्लेख केला आहे.

१४ ) अग्निवेशानी प्रतिपादित केलेले विषमज्वर हे संतर्पणजन्य अर्थातच दोषांच्या गुरुत्वाने होणारे आहेत हेही एक वैशिष्ट्य होय.

१५ ) आयुर्वेदाचे अध्ययन करू इच्छिणाऱ्या शिष्याची निवड करताना त्याचे गुणविशेष लक्षात घ्यावेत, वर्ण विचारात घेण्याची आवश्यकता नाही असा आचार्यांनी आपला दृष्टिकोन ठेवलेला दिसतो. त्यांच्या विचारे वर्ण हा जन्माने होत नसून अध्ययन आणि कर्म यांनीच बनतात असे आहे.

१६ ) अनधिकृत आणि अनधीत म्हणजे राज्यशासनाने संमत न केलेला आणि शास्त्र न शिकलेला वैद्य समाजात असू नये यावरही आचार्यांचा कटाक्ष होता. अशा वैद्यांना 'छद्मचर' म्हणजे ढोंगी किंवा सिद्धसाधक अशा शब्दांनी त्यांनी धिःकारले आहे. शिवाय व्यवसायी वैद्यासाठी आचार्यांनी नीतिनियमही सांगितले आहेत.

१७ ) प्राचीन अन्य संहितांपेक्षा एक विशेष अशी गोष्ट प्रतिसंस्कर्ता दृढबल यांनी सांगितली ती वातावृत वातविकार ही होय.

## सुश्रुत

चरक संहितेबरोबरच सुश्रुत संहितेचे नाव सर्वतोमुखी आहे. सुश्रुताचार्यांनी सुद्धा आपली ही संहिता वैशिष्ट्यपूर्ण अशी रचली आहे. इतर संहितांहून सुश्रुतसंहितेचे महत्त्व आगळेच आहे. या संहितेची कांही वैशिष्ट्ये आहेत. तीं अशीं—

१ ) इतर संहिताकारांनी वात, पित्त आणि कफ असे तीन दोष मानले आहेत तर सुश्रुताचार्यांनी 'रक्त' हा चवथा दोष मानला आहे. शस्त्रक्रियाप्रधान असा हा संहिताग्रंथ आहे. शस्त्रक्रियेत जीविताधार रक्ताशीच संबंध येत असल्याने त्याचे महत्त्व त्रिदोषाप्रमाणेच सुश्रुतांना वाटले असले पाहिजे.

२ ) जरी सुश्रुतसंहिता हा शल्य म्हणजे शस्त्रचिकित्साप्रधान ग्रंथ असला तरी हे शस्त्रकर्म शक्य तो कसे टाळता येईल, अगदी कमीतकमी व अपरिहार्य म्हणूनच ते करावे लागेल, शक्य तो शस्त्रकर्मावाचूनच रोगी बरा करता यावा ह्या दृष्टीने व त्या त्या अवस्थेनुसार पूर्व चिकित्सा कशी करावी हे सुश्रुताचार्यांनी आपल्या संहितेत प्रतिपादन केले आहे.

शल्य शब्दाची व्याप्ती सुश्रुताचार्यांनी केवळ एखाद्या बाह्य वस्तूचा होणारा शरीरप्रवेश अशी संकुचित स्वरूपाची केलेली नसून मन आणि शरीर ह्या दोहोंनाही बाधक असे जे रज व तम हे दोन मानसिक दोष व वातपित्तकफ हे शारिरिक दोष त्यांना सुद्धा शल्य मानलेले आहे; व म्हणून युद्धप्रसंगी शरिरात घुसणाऱ्या शत्रूकडील बाणाच्या टोकांची शल्ये किंवा अन्य आघात अपघातादि निमित्ताने शरिरात प्रविष्ट होणारे शल्यरूप पदार्थ कसे काढावेत याबद्दल जशी विस्तृत माहिती दिली तशीच रज तम व वातपित्तकफ ह्या दोषरूप शल्यांचेही निष्कासन मनाच्या खोलीतून व शरिरातून कसे करता येते हेही सुश्रुताचार्यांनी सांगितले आहे. उन्माद, अपस्मार, ग्रहबाधा यांवरील चिकित्सा हेच सांगते. शिवाय शालाक्यतंत्र म्हणजे सळयांचा उपयोग करून रोगावर करावयाचे नाक, कान, घसा इ० वरील उपचार, व प्रसूतिशास्त्र हे सुद्धा सुश्रुताचार्यांनी वैशिष्ट्यपूर्ण सांगितले.

३) कांही कांही रोगांवर सुश्रुताचार्यांनी रक्तस्रुती, क्षारचिकित्सा, अग्निकर्म म्हणजे डागण्याची चिकित्सा आणि शस्त्रक्रियेचे जे उपचार निवेदन केले आहेत ते असे आश्चर्यकारक वाटतात की शारीरशास्त्र दृष्टीने त्यांचा कार्यकारण संबंध लावता येत नाही. तथापि त्या चिकित्साप्रयोगांनी प्राप्त होणाऱ्या यशावरून रोगस्थान आणि चिकित्सास्थान यांचा परस्पर संबंध असलाच पाहिजे हे मान्य करावे लागते.

४ ) तुटले अथवा छेदले गेलेले अवयव पूर्ववत् करण्यासाठी दुसऱ्या ठिकाणची त्वचा व मांस काढून त्यांचे कलम त्या अवयवावर करण्याचा शस्त्रक्रियेचा एक प्रकार सुश्रुतसंहितेत वर्णिलेला आढळतो. अलीकडे अशाच प्रकारची शस्त्रक्रिया प्लास्टिक सर्जरी या नावाने केली जाते हे पाहिले म्हणजे सुश्रुताचार्यांचे त्याकाळचे हे कौशल्य वैशिष्ट्यपूर्णच म्हटले पाहिजे.

५ ) शारीरशास्त्राच्या अभ्यासासाठी शवच्छेदनाची विशिष्ट पद्धती सुश्रुताचार्यांनी वर्णिली आहे.

६ ) भूत चिकित्सा म्हणजे जंतुचिकित्सा, भूतांची वैशिष्ट्ये, त्यांचे स्वभाव, त्यांची स्थाने, त्यांच्यामुळे होणारे रोग, एका व्यक्तीकडून अन्य व्यक्तीस स्पर्शानें होण्याचे प्रसंग व त्यामुळे त्या दुसऱ्या व्यक्तीला होणारे औपसर्गिक रोग, यांची विस्तृत कल्पना सुश्रुताने मांडली आहे. ही जंतूंच्या स्वभाव कार्याशी जुळती आहे.

७ ) विपाककल्पना ही एक आयुर्वेद शास्त्रात वैशिष्ट्यपूर्णच आहे. तथापि त्याही बाबतीत सुश्रुताचार्यांनी इतर ग्रंथकार रसविपाक कल्पना प्रतिपादन करतात तशी न करता 'द्रव्यविपाक' कल्पनेचा पुरस्कार केला आहे.

८ ) सुश्रुतप्रतिपादित विषमज्वर ह्या चरकप्रतिपादित विषमज्वरासारखा संतर्पणजन्य गुरुदोषात्मक नाही तर तो अल्प दोषकृत आहे. शिवाय विषमज्वराचे स्थानाश्रित विषमज्वर म्हणूनही आणखी निराळे प्रकार सुश्रुताचार्यांनी प्रतिपादन केले आहेत.

९ ) व्रणरोग्यांसाठी व्रणितागार स्वतंत्र असावे असे सुश्रुताचार्यांनी त्याच्या रचनेचेही दिग्दर्शन करून प्रतिपादिले आहे. तसेच केवळ व्रण ह्या एकाच विकाराचे अवस्थापरत्वे ६० प्रकारचे उपचारही आपल्या संहितेतून वर्णिले आहेत.

१० ) बाळंतिणीसाठी सूतिकागार व बालकांसाठी कुमारागाराची योजना सुश्रुताचार्यांनी सुचविली आहे.

११ ) विषचिकित्सेचा विस्तृत विचार सुश्रुताचार्यांनी आपल्या संहितेतून केला असून स्थावर म्हणजे कंद, मुळें, फळें, पानें, फुलें, रस, चीक अशा वनौषधींच्या विषांचा अंगपरत्वे विचार, खनिज विषारी द्रव्यांचा विचार आणि जंगम म्हणजे सर्प, विंचू, पाल, माशा इ० व वाघ, सिंह, कुत्रा इ० प्राण्यांच्या दंशामुळे होणाऱ्या विषाचा विचार आणि त्यावरील उपचारही विस्तृत स्वरूपात सुश्रुताचार्यांनी सांगितले आहेत.

१२ ) यंत्रे आणि शस्त्रे यांच्याही बाबतीत त्यांची घडण, धारांचे तीक्ष्णत्व, त्या बोथट झाल्यास त्यांना पाणी देण्याचे निरनिराळे प्रकार, यंत्रांची पकड, त्यांच्या ओळखीसाठी त्या त्या यंत्रशस्त्राला दिलेली अन्वर्थक नावे, त्यांचे गुण आणि कार्य अशा सर्वांगीण दृष्टीचे विवेचन सुश्रुत संहितेत आढळते.

१३ ) कोणताही रोग व्यक्त होण्यापूर्वी केवळ पूर्वरूपावरून तो जाणावयाचा नसतो तर त्या पूर्वरूपाच्याही अगोदरच्या तीन अवस्थांतून तो वाढत असतो. त्या अवस्था म्हणजेच पूर्वरूपाच्या अगोदर प्रसरावस्था, तिच्याही पूर्वी प्रकोपावस्था आणि सर्वांआधी संचयावस्था होत. हें ही सुश्रुताचार्यांनी सांगून तदनुसार चिकित्साही निवेदन केली आहे.

## वाग्भट

चरक, सुश्रुतानंतर विशेष अभ्यसनीय दृष्टीने वाग्भट ह्या ग्रंथकारांच्या संहितांचे वैशिष्ट्य डोळ्यात भरण्याजोगे आहे. अष्टांगहृदय आणि अष्टांगसंग्रह असे दोन संहिताग्रंथ वाग्भटांचे आहेत. ह्या दोहींचे रचनाकार वाग्भट दोन वेगळे आहेत. अष्टांगहृदय संहिताग्रंथकार वाग्भट हा मागाहून झाला आणि अष्टांगसंग्रहकार वाग्भट हा अगोदर होऊन गेला असून 'वृद्धवाग्भट' असे त्याला संबोधिले जाते. तथापि त्याविषयींचा ऊहापोह करण्याचे हे स्थान नव्हे. वृद्धवाग्भटाचीच छोटी आवृत्ती म्हणून अष्टांगहृदय संहिता असल्याचे अष्टांगहृदयकार वाग्भटानेच स्वतः म्हटले आहे. त्या दृष्टीनें त्या वाग्भटाचे वैशिष्ट्य पाहावयाचे आहे.

१ ) शास्त्रीय ग्रंथरचनेच्या दृष्टीने वाग्भट हा श्रेष्ठ ग्रंथ होय हे कुणीही मान्य करील. या ग्रंथातील सूत्रस्थान हे आयुर्वेदीय तत्त्वज्ञान परिपूर्ण झाले आहे. ह्या स्थानाच्या पहिल्याच अध्यायात संपूर्ण ग्रंथांत पुढे येणाऱ्या विषयांचे सूतोवाच केले असून त्या विषयांचा विस्तार पुढील अध्यायात व इतर स्थानातून केला आहे. निदान—चिकित्सादि स्थानांच्या विस्ताराची भूमिका सूत्रस्थानात आढळते.

२ ) अत्यंत थोडक्यात सूत्रमय भाषेत पुष्कळ आशय येईल अशा सूत्रांची सुंदर गुंफण वाग्भटाने केली आहे.

३ ) ग्रंथरचनेचे संकेत ठरवून त्याप्रमाणे द्विरुक्ति न करता विषयविस्तार करण्याचे कौशल्य वाग्भटाच्या ठिकाणी आढळते.

४ ) वृद्ध वाग्भट प्रासादिक कवीही होता. हे त्यानी काव्यमय रोचक वर्णने प्रसंगानुसार केलेली वाचली म्हणजे सहज पटते. काव्यबद्ध रचनेमुळे वाग्भटाचे काव्य पठनसुलभही झाले आहे.

५ ) चिकित्सास्थानही अत्यंत उत्कृष्ट झाले आहे. रोग्याच्या पूर्वरूपापासून पुढे पुढे क्रमशः होणाऱ्या अवस्थांचे दिग्दर्शन आणि तदनुसार चिकित्सा हे वाग्भटाचे वैशिष्ट्यच म्हणता येईल.

६ ) वाग्भटाने धर्माचा अभिनिवेश न धरता 'सर्वधर्मेषु मध्यमाम्' अशा भूमिकेचाच पुरस्कार केला आहे. सर्व

लोकांनी आपापल्या इष्टदेवतेचे पूजन अर्चन करावे असाच आदेशही दिला आहे. शिव, शिवसुत, तारा अशा हिंदु आणि जैन – बौद्ध देवतांची उपासना कुष्ठासारख्या रोगावर सुचवली आहे. यावरूनच त्याची धर्माग्रही वृत्ती नव्हती हे दिसून येते.

### काश्यपसंहितेचे वैशिष्ट्य

काश्यपसंहिता आणि वृद्धजीवकीय तंत्र या नावाने आज आपणासमक्ष उपलब्ध असलेला ग्रंथ हा बराचसा अपूर्ण व त्रुटित आहे. नेपाळ संस्थानचे राजगुरु वैद्य पंडित हेमराजशर्मा यांनी महत्प्रयासांनी ताडपत्रावरून संशोधित करून तो प्रसिद्ध केलेला आहे. यामुळे वाळवीने खाल्लेल्या व जीर्णशीर्ण झालेल्या या ताडपत्रांवरील बरीचशी सूत्रे अपूर्ण, अर्धवट अथवा संपूर्ण नष्ट झालेली आढळतात. तथापि उपलब्ध ग्रंथ वाचल्यानंतर हा ग्रंथ बालकांच्या आरोग्याला उद्देशून लिहिलेला आहे असे दिसते. त्याला अनुलक्षून बालकाच्या मातेची गर्भधारणा, त्यातील संभाव्य उपद्रव आणि उपचार तसेच प्रसूतीनंतरचे उपचार यांचे मार्मिक वर्णन या संहितेत आहे व पुढे बालकाचे आरोग्यरक्षण, संवर्धन व रोगापहरण याला उद्देशून सविस्तर असे विवेचन केलेले आहे.

१ ) प्रसूतीकाल समीप आला असता जेव्हा वेणा येणे बंद होते किंवा त्या फारच उशीरा उशीरा येत असतात अशा वेळी निरनिराळ्या वैद्यक ग्रंथांतून गर्भिणीने त्यावेळी हाती मुसळ घेऊन साळी वगैरे सारखे धान्य कांडावे अथवा अन्य श्रम करावे; त्याचप्रमाणे मुद्दाम जांभया आणणे, अथवा इकडे तिकडे फिरणे अशा गोष्टी करावयास सांगितल्या आहेत. परंतु काश्यपांनी या गोष्टींचा तीव्र निषेध केलेला आहे.

**जीवक मुनि म्हणतात**—" केचिदस्यामवस्थायां व्यायामं मुसलादिकं चंक्रमणाद्यं च भिषजः ब्रुवते हितम् । वर्जनीयं तु तत्सर्वं भगवान् आह कश्यपः ॥

**त्यांचे म्हणणेः**–" नार्याःप्रसवकाले हि शरीरमुपमृद्यते ।
त्रयो दोषाः प्रकुप्यन्ति विचाल्यन्ते च धातवः ।
गर्भिणी तदवस्था हि यत्नधार्या विशेषतः"

या सूत्रातून त्यांनी स्पष्ट मांडले आहे. ही गोष्ट काश्यपांच्या सूक्ष्मावलोकनाचे वैशिष्ट्य दर्शविते.

२ ) बालकांच्या विकाराचे स्थान व स्वरूप ओळखण्याची विशिष्ट चिन्हे दिली आहेत.

३ ) बालकांना होणाऱ्या क्षयासारख्या चिन्हांनी युक्त अशा बालशोष, फक्क इ० नावांनी ओळखल्या जाणाऱ्या रोगांचेही इतरत्र न आढळणारे वर्णन अत्यंत मार्मिक असे ह्या संहितेत उपचारांसह पाहावयास सापडते.

४ ) रसात् रक्तं ततो मांसं इ० शारीर धातु घटकांची क्रमशः म्हणजे अनुलोम पद्धतीने उत्पत्ती होते हे प्रतिपादन सर्वच वैद्यक ग्रंथांतून आढळते परंतु मानवी जीवाची गर्भस्थ होणारी प्रथम वाढ क्रमशः उलट गतीने म्हणजे प्रतिलोम गतीने अर्थात् शुक्रानंतर मज्जा, नंतर अस्थि अशा क्रमाने रक्तापर्यंतचे धातु निर्माण होतात हे स्पष्टपणे आपल्या सूत्रांतून ह्या काश्यपसंहितेतच सांगितलेले आढळते.

### माधवनिदान

इसवी सनाच्या सातव्या शतकात 'माधवकर' नामक पंडितांनी केवळ निदानविषयक अशी केलेली ग्रंथ रचना 'माधवनिदान' ह्या नावाने प्रसिद्ध झाली. आयुर्वेदाच्या अभ्यासक्रमात पुष्कळशा विद्यालयातून पाठ्यपुस्तक म्हणून हा ग्रंथ शिकविला जातो. 'निदाने माधवः श्रेष्ठः' इतकी ह्या ग्रंथाची ख्याती आहे. याचीही काही वैशिष्ट्ये आहेत.

( १ ) रोगनिदानाच्या बाबतीत चरक, सुश्रुत, वाग्भट, विदेह इ० प्राचीन ग्रंथवचनांचा संग्रह.

( २ ) सोपी, सरळ संस्कृत पद्यरचना.

(३) मधुकोश आणि आतंकदर्पण यांसारख्या विस्तृत टीकांचे भाग्य शार्ङ्गधर संहितेखेरीज इतर वैद्यक ग्रंथांना फारच थोडे लाभले आहे व याचे कारण माधवकराचे उपयुक्त संकलन होय असे म्हटले तरी चालेल.

४ ) संग्रहणी निदानात "पृथग् वातादिनिर्दिष्टहेतुलिंगसमागमे त्रिदोषे निर्दिशेदेवं" ह्या श्लोकात शेवटी

'तेषां वक्ष्यामि भेषजम्' हें वाक्य हा एकच दोष ह्या ग्रंथात आढळतो. संपूर्ण ग्रंथ हा रोगनिदान ग्रंथ आहे. त्यात चिकित्सा म्हणजे औषधी योजनेचा सुतरां संबंध नसल्याने ही ओळ अप्रस्तुतच ठरते.

### शार्ङ्गधर

शार्ङ्गधर इ. स. १३६३ च्या सुमारास झाल्याचा उल्लेख हिस्टरी ऑफ इंडियन फार्मसी ह्या ग्रंथाचे लेखक श्री. श्रीवास्तव यांनी केला आहे. या ग्रंथाच्या आरंभी आलोचक म्हणून पशुरामशास्त्री यांनींच कांहीं वैशिष्टें लिहिली आहेत. तीं अशी---

१ ) लघुत्रयी म्हणून ज्या तीन आयुर्वेद ग्रंथांचा उल्लेख आहे त्यांमध्ये शार्ङ्गधर संहितेचा अंतर्भाव आहे.

२ ) ह्यातील शारीर हा विषय अत्यल्प असून तो चरकातून घेतलेला आहे.

३ ) नेत्र, जिव्हा, मूत्र व नाडी यांच्या भिन्नभिन्न स्वरूपावरून रोगविशेष कसे ओळखावे हे लिहिले आहे.

४ ) रोगांची फक्त संख्या दिली आहे.

५ ) निघंटु विषय ह्या ग्रंथात घेतला नाही.

६ ) क्वाथ, अवलेह, चूर्ण, गुटी, रस, आसवे आणि अरिष्टे यांचे प्रयोग अनुभूत असे दिले आहेत.

७ ) ह्या ग्रंथावर दीपिका, गूढार्थदीपिका व आयुर्वेद-दीपिका अशा तीन टीका झाल्या.

### योगरत्नाकर

प्रो. प. कृ. गोडे ह्या संशोधकांनी भारत इतिहास संशोधन मंडळापुढे वाचलेल्या 'योगरत्नाकराचा कालनिर्णय' ह्या विषयावरील निबंधामध्ये इ. स. १६५० नंतर पण १७ व्या शतकात योगरत्नाकर ग्रंथ झाला असावा असे म्हटले आहे. याचे एक गमक म्हणून देताना या ग्रंथात तमाखू ह्या वनस्पतीचे गुणधर्म दिले गेले आहेत व इ. स. १६५० च्या सुमारास तमाखू प्रचारात आली असल्याने त्यानंतरच्या नजीकच्या काळातच ह्या ग्रंथाची रचना झाली असावी.

### भावप्रकाश

आयुर्वेदाच्या अभ्यासक्रमात 'लघुत्रयी' म्हणून ज्या ग्रंथांचा समावेश केला गेला आहे त्यांतच 'भावप्रकाश' या ग्रंथाचा उल्लेख आहे. दुसरे दोन ग्रंथ योगरत्नाकर आणि शार्ङ्गधर हे होत. ज्यांना आपण प्राचीन संहिताग्रंथ म्हटलें आहे त्या चरक, सुश्रुत, वाग्भट ह्यांच्यानंतर पुष्कळच दीर्घकाळाने ह्या तीन ग्रंथांचे प्रकाशन झाले व ह्या तीनही ग्रंथांतून चरक, सुश्रुत, वाग्भट ह्या संहिता-ग्रंथांचे आधार घेतले असल्यानेच यांना लघुत्रयी नाव दिले गेले व नंतरच संहिताग्रंथ हे तीनही मोठे ग्रंथ म्हणून त्यांना आपोआपच बृहत्त्रयी नाव मिळाले.

काल---भावप्रकाश ग्रंथरचनाकार भावमिश्र असून लटकनमिश्र हे यांच्या पिताजींचे नांव होते. भावमिश्र इसवी सनाच्या १५५० च्या सुमारास झाले असे संशो-धकांच्या निवेदनावरून म्हणता येते. अत्यंत सोपी रचना व प्रस्तुत काळाला अनुसरून प्रचलित अशा गोष्टींचा समावेश ह्या ग्रंथात असल्याचे दिसून येते.

१ ) इतर सर्वही ग्रंथांपेक्षा अगदी डोळ्यात भरण्या-जोगे ह्या भावप्रकाशाचे वैशिष्टय म्हणजे संपूर्ण ग्रंथातून 'हरीतक्यादि निघंटु' ह्या नावाचा एक विभागच स्वतंत्र कल्पून त्यात बहुतेक औषधिद्रव्यांचे गुणधर्म सांगितले आहेत.

२ ) प्राचीन संहिताग्रंथांतून ज्या औषधिद्रव्यांची नावे आली नाहीत व जीं द्रव्ये त्या नंतरच्या काळी प्रचा-रात आली, अशा कितीतरी द्रव्यांचे शास्त्रीय नामकरण करून त्यांचे गुणधर्म विवेचनपूर्वक चिकित्साकार्यात त्यांचा समावेश केला आहे. अफू, कापूर, खजूर, सुलेमानी लवण, खुरासानी ओवा इ० नावे उदाहरणार्थ होत.

३ ) पोर्तुगीजांचा प्रवेश भारतात झाल्यानंतरच सध्या ज्याला गरमीचा रोग किंवा उपदंश म्हणतात तो भारतात आला. पोर्तुगीजांना 'फिरंगी' हे म्हटले गेल्यामुळे उप-दंशाच्या भयंकर चिन्हांनी युक्त अशा ह्या रोगाला भाव-मिश्राने रोगनिदानात 'फिरंगोपदंश' नावाने समाविष्ट केले व त्यावरील चिकित्साही सांगितली.

**मप्रकाशे देशे कोथयेत् । सम्यक् प्रकुथितं चोद्धृत्य ततो देहं सप्तरात्रादुशीरबालवेणुवल्कलकूर्चानामन्यतमेन शनैः शनैरवघर्षयंस्त्वगादीन्सर्वानेव बाह्याभ्यन्तरानङ्गप्रत्यङ्गविशेषान् यथोक्तान् लक्षयेचक्षुषा** ( सु. शा. ५. ४९ )
अंगोपांगे शास्त्रोक्त वर्णनानुसार पाहून, अभ्यासून निश्चित करणे. शंभराच्या आंतल्या वयाच्या, दीर्घकालीन रोगाने न पीडलेल्या, सर्व अंगोपांगे असलेल्या, विषाने न मेलेल्या व्यक्तीचे प्रेत आतडी व मळ काढून टाकून, वाहत्या पाण्यात दर्भ, मुंजा, वल्कले, सण इत्यादीपैकी एकात सर्वत्र गुंडाळून, पिंजऱ्यात घालून, अंधेऱ्या जागी ठेवून कुजवावे. चांगले कुजले आहे असे पाहून सात दिवसांनीं वाळ्याचे धागे, केश, बांबूची साल इत्यादींचे कुंचले करून त्यांनी हळूहळू खरडून त्वचादिबाह्य व इतर अभ्यंतर सर्व अंगप्रत्यंगाचे शास्त्रोक्तविशेष प्रत्यक्ष डोळ्यांनी अभ्यासावे.

**–विवर्णता**–स्त्री., **स्वाभाविकवर्णस्य अन्यथा भावः** ( चचि. १२.११ ) स्वाभाविक वर्णात बदल.

**–वेदना**–स्त्री., **रोगलक्षण०, अङ्गमर्दः** ( चनि. २.६ ) अंगपीडा.

**–व्यसनिन्**–वि., **छिन्ननासादिः एवंप्रकारः दूतः मरणसूचकः** ( च. इं. १२.१७ )
नाक इत्यादी झडलेला असा दूत रोग्याचा मरणसूचक होय.

**–शीर ( र्य ) ण**–न., **रोगलक्षण०, शरीरावयवानां विगलनम्, चत्वारिंशत् पित्तविकारेष्वेकः** ( कासू. २७.३५ ) बोटे इत्यादी अवयव गळणे, झरणे, झडणे. चाळीस पित्तविकारांपैकी एक.

**–शूल**–पु., **रोगलक्षण०, अङ्गमर्दः** ( चचि. ३.२४४ ) अवयवात शूळ होणे.

**–संशोष**–पु., **रोगलक्षण०, कार्श्यम्** (चचि.२८.७३) अवयव सुकणे, कृश होणे, वाळणे.

**–सदन**–न., **रोगलक्षण०, अङ्गसादः** ( अहृसू. १७.१६ ) अंग गळल्यासारखे वाटणें.
**अवयवानां ग्लानिः, अङ्गानामनुत्साहः, रसदोषजविकारेष्वेकः**
अवयवांची ग्लानि, अनुत्साह, रसदोषापासून होणाऱ्या विकारांपैकी एक.

**–साद**–पु., **रोगलक्षण०, अङ्गसदनम्** (सुउ. २४.२३) ( अहृसू. ४.१० ) गळल्यासारखे वाटणे.

**–सावर्ण्य**–न., **अङ्गसमानवर्णता** ( सुचि. ९.३८ ) अंगाच्या त्वचेच्या रंगासारखा रंग.

**अङ्गावदरण**–न., **रोग०, अङ्गस्यावदरणं स्फुटनं विदारणं च, चत्वारिंशत्पित्तविकारेष्वेकः** ( चसू. २०.१४ ) त्वचा फाटणे, पाय इ. फुटणे. ४० पित्तविकारांपैकी एक.

**अङ्गावसादन**–न., **रोगलक्षण०, अङ्गानां दौर्बल्यम्** (चचि. १.३३) अंग गळणे, अवयवांची अशक्तता.

**अङ्गार**–पु., **अग्निः** ( चसू. १४.२८ ) विस्तव.
**अभस्मसात्कृतो दग्धकाष्ठखण्डः** ( सुसू. २९.११ )
**कोकिलः** ( र. ७.१६ )
भस्म न झालेला निखारा. जळल्या लाकडाचा तुकडा.

**–कोष्ठकस्तम्भ**–पु., **अग्निकुण्डस्तम्भः** (असंसू.२६.१५) निखाऱ्यांनीं भरलेला पोकळ खांब.

**–कोष्ठी**–स्त्री., **साग्निमृण्मयकोश०, खराणां द्रव्याणां सत्त्वपातनी कोष्ठी** ( र. १०.३४–३८ ) कठीण द्रव्यांचे सत्व पाडण्याकरितां तयार केलेली कोठी.

**–ग्रन्थिक**–वनस्पति० हिमावली (रा.परि. १५.१८) वसु. एक वनस्पति.

**–चूडक**–पु., **प्रतुदपक्षि०** (चसू.२७.५२) एक पक्षी.

**–यान**–न., **अङ्गारपूर्णशकटिका** ( सुउ. ६४.२५ )
**अग्नियानम्** ( असंसू. ४.१८ )
निखाऱ्यांनी भरलेली शेगडी.

**–वल्लरी**–स्त्री., **वनस्पति०, भार्गी** ( ध. १.६८ ) ( रा. ६.९५ ) भारंगी.

**–वल्लिका–वल्ली**–स्त्री., **वनस्पति०, भार्गी** ( ध. १.६८ ) **महाकरञ्जः** ( ध. ५.११० ) भारंगी, मोठा करंज.

**–शूल्य**–वि., **शूलस्थं कृत्वा अङ्गारे भर्जितम्** ( चसू. २६.८४ )
सळईवर लपेटून निखाऱ्यावर भाजलेले ( मांस. )

**अङ्गारकमणि**–पु., **जाङ्गमद्रव्य०, प्रवालम्** (रा. १३.७३) प्रवाळ, प्राणिज द्रव्य.

**अङ्गिरस**–पु., **महर्षि०, हिमालये इन्द्रादेशाद् रसायनप्रयोगं कृतवान्.** ( चचि. १ [४] ३ )
एक महर्षि., इंद्राच्या आदेशाने हिमालयात रसायनप्रयोग करणारे ऋषि.

**अङ्गुल**–न., **मान०** ( असंशा. ७.३३ ) अंगुळी.

**–मित**–न., **अङ्गुलमानम्** ( सुशा. ६.२८ ) अंगुळभर, बोटभर, बोटा इतके.

**–राजि**–पु., **राजिमान् सर्पविशेषः** ( सुक. ४.३४ ( ३ ) एक सर्प. ( पट्टे असलेला. )

**अङ्गुलास्थि**–पु., **अङ्गुलगतमस्थि** ( का. शरीरविचय ) बोटाचे हाड.

**अङ्गुलि**–स्त्री., **हस्तपादशाखासु प्रत्यङ्ग०, प्रतिशाखायां पञ्च, मिलित्वा विंशतिः** ( सुशा. ५.४ ) **अङ्गुष्ठः, प्रदेशिनी, मध्यमा, अनामिका, कनिष्ठिका चेतिक्रमेण पञ्चाङ्गुलयः** ( सुसू. ३५.१२ ) हातपाय या शाखांचे उपांग, बोट. प्रत्येक शाखेला पांच मिळून वीस. अंगठा, दुसरे, मधले, चौथे व लहान बोट मिळून ५ बोटे.

**–त्राणक**–न., **यन्त्र०**, ( असंसू. ३४.१२. ) बोटात घालावयाचे यंत्र.

**–दाह**–पु., **रोगलक्षण०, सविषान्नपानरसस्पर्शेन कराङ्गुलीनां ज्वलनम्** ( चचि. २३.११२ ) बोटाची आग–सविष अन्नादिकांच्या स्पर्शाने होणारी.

**–पर्वन्**–न., **मान०, अङ्गुलस्य विशेषतः करमध्यमाङ्गुलस्य ( आढमल्ल ) मध्यभागः सन्धिस्वरूपः, अयं शरीरमानार्थमुपयुज्यते** ( सुसू. ३५.१२ ) ( चवि. ८.११७ ) बोटाचे पेरे. मधल्या बोटाचे पेरे, शरीराच्या मापनाकरिता उपयुक्त.

**अवयव०., अंगुलिग्रंथिः** ( सुसू. ३५.४ ) बोटाचा उंचवटा.

**अवयव०., अङ्गुलिशलाका** ( सुसू. १८.१८ ) बोटाच्या हाडांपैकी एक हाड. अंगुळीची सळई-सारखी हाडे.

**–प्रमाण**–न., **प्रमाण०, अङ्गुलिः, करशाखा, तया मानम्** ( चवि. ८.११७ ) बोटभर, बोटाइतके. अंगुली म्हणजे हाताची शाखा, तिच्या मापाने मोजणें.

**–फला**–स्त्री., **वनस्पति०, निष्पावी** ( रा. परि. ७.१०० ) आबई.

**–शस्त्र**–न., **शस्त्र०, तच्च द्विविधम् (१) अन्तर्मुखसंज्ञितं कुशतरशशधरकानुकारिणाऽर्धद्वयसंहितमध्यकीलितेन मध्यमाङ्गुल्यङ्गुष्ठप्रविष्टलोहकटकनियमितं शस्त्रम् (२) एकावयवं मध्यमाङ्गुलीप्रविष्टकण्टकं शस्त्रम्** ( सुचि. १५.१२ ) अंगठा व मधले बोट यांत पकडावयाचे व केवळ मधल्या बोटात घालावयाचे असे दोन प्रकारचे शस्त्र.

**–शस्त्रक**–न., **अङ्गुलिशस्त्रम्** ( अहसू. २६.१३ ) ( असंसू. ३४-२६ ) तर्जनीत घालावयाचे शस्त्र.



**–शूल**–पु., **रोगलक्षण०** (चसि.२.१६) बोटातला शूळ.

**–शोष**–पु., **रोगलक्षण०**, ( चसि. २.१६ ) बोट वाळणे, सुकणे, कृश होणे.

**–सन्धि**–पु., **शारीर०, अङ्गुलीनां सन्धिः** ( चचि. २९.२६ ) बोटामधील सांधा.

**–स्तम्भ**–पु., **रोगलक्षण०, अङ्गुलेर्निश्चलत्वम्** ( चसि. २.१६ ) बोट ताठरणे, बोटाची हालचाल न होणे.

**अङ्गुलिका**–स्त्री., **कीट० तन्नामकपिपीलिकाभेदः; तया दष्टे श्वयथुरग्निस्पर्शवद्दाहशोफौ भवतः** ( सुक. ८.३४ ) मुंगीसारखा एक किडा. हा चावला तर सूज, निखाऱ्याच्या स्पर्शासारखा दाह होतो.

**अङ्गुली**–स्त्री., **शारीर०, अङ्गुलिः** ( सुचि. ३.२४ ) बोट. अंगुळी.

**अङ्गुल्यन्तर**–न., **स्थानविशेषः** ( सुनि. १३.३२ ) दोन बोटांमधील अंतर जोडणारी तळांतील त्वचा, अंतर, पोकळी.

**अङ्गुष्ठ**–पु., **अङ्गुलिः सार्धत्र्यङ्गुलप्रमाणः** ( सुसू. ३५.१२) आंगठा. साडेतीन अंगुळाइतका.

**–मूल**–न., **अङ्गुष्ठस्य मूलभागः** ( सुसू. ३५.१२ ) अंगठ्याचे मूळ.

**–संमित**– वि., **अंगुष्ठपरिणाहा ( वर्तिः )** (चसू. ५.२४) आंगठ्याच्या घेराइतकी जाड (वात)

**अङ्गुष्ठोदरप्रमाण**–न., **प्रमाण० विंशतितमभागोनषड्यवप्रमाणम् =५ १९/२० यवाः** ( सु. शा. ४.४ ) आंगठ्याच्या दोन्ही पेराच्या मध्यावर–संधीवर असलेल्या भागाच्या घेराइतके. पाच पूर्णांक एकोणवीस वीसांश जवां इतके.

**अङ्घ्रि**–पु., **शारीर०, पादः** ( अहसू. २.३१ ) पाय.

**–मूलम्**–**( वृक्षादेः )** ( र. १४.९४ ) झाड इत्यादींचे मूळ.

**–बला**–स्त्री. **वनस्पति० पृश्निपर्णी** ( ध. १.९० ) पिठवण.

**अचक्षुष्य**–वि., **चक्षुषेऽहितम्** ( अहसू. ५.५५ ) डोळ्याला–दृष्टीला अहितकर.

**अचङ्क्रमणशील**–वि., **आस्यासुखी, चङ्क्रमणं गमनागमनं यो न करोति** ( च. चि. २९.८ ) जाणे, येणे, चालणे यांचा नेहमी कंटाळा करणारा, नेहमी बसून राहाणारा.

**अचरणा**–स्त्री., **योनिरोग०, अधावनाचरणादचरणा** ( चसू. १९.४ ( ९ ) **अधावनाजातां जन्तवः**

**मप्रकाशे देशे कोथयेत् । सम्यक् प्रकुथितं चोद्धृत्य ततो देहं सप्तरात्रादुशीरबालवेणुवल्कलकूर्चानामन्यतमेन शनैः शनैरवघर्षयंस्त्वगादीन्सर्वानेव बाह्याभ्यन्तरानङ्गप्रत्यङ्गविशेषान् यथोक्तान् लक्षयेच्चक्षुषा** ( सु. शा. ५. ४९ )
अंगोपांगे शास्त्रोक्त वर्णनानुसार पाहून, अभ्यासून निश्चित करणे. शंभराच्या आंतल्या वयाच्या, दीर्घकालीन रोगाने न पीडलेल्या, सर्व अंगोपांगे असलेल्या, विषाने न मेलेल्या व्यक्तीचे प्रेत आतडी व मळ काढून टाकून, वाहत्या पाण्यात दर्भ, मुंजा, वल्कले, सण इत्यादीपैकी एकात सर्वत्र गुंडाळून, पिंजऱ्यात घालून, अंधेऱ्या जागी ठेवून कुजवावे. चांगले कुजले आहे असे पाहून सात दिवसांनीं वाळ्याचे धागे, केश, बांबूची साल इत्यादींचे कुंचले करून त्यांनी हळूहळू खरडून त्वचादिबाह्य व इतर अभ्यंतर सर्व अंगप्रत्यंगाचे शास्त्रोक्तविशेष प्रत्यक्ष डोळ्यांनी अभ्यासावे.

**–विवर्णता**–स्त्री., **स्वाभाविकवर्णस्य अन्यथा भावः** ( चचि. १२.११ ) स्वाभाविक वर्णात बदल.

**–वेदना**–स्त्री., **रोगलक्षण०, अङ्गमर्दः** ( चनि. २.६ ) अंगपीडा.

**–व्यसनिन्**–वि., **छिन्ननासादिः एवंप्रकारः दूतः मरणसूचकः** ( च. इं. १२.१७ )
नाक इत्यादी झडलेला असा दूत रोग्याचा मरणसूचक होय.

**–शीर ( र्य ) ण**–न., **रोगलक्षण०, शरीरावयवानां विगलनम्, चत्वारिंशत् पित्तविकारेष्वेकः** ( कासू. २७.३५ ) बोटे इत्यादी अवयव गळणे, झरणे, झडणे. चाळीस पित्तविकारांपैकी एक.

**–शूल**–पु., **रोगलक्षण०, अङ्गमर्दः** ( चचि. ३.२४४ ) अवयवात शूळ होणे.

**–संशोष**–पु., **रोगलक्षण०, कार्श्यम्** (चचि.२८.७३) अवयव सुकणे, कृश होणे, वाळणे.

**–सदन**–न., **रोगलक्षण०, अङ्गसादः** ( अहसू. १७.१६ ) अंग गळल्यासारखे वाटणें.
**अवयवानां ग्लानिः, अङ्गानामनुत्साहः, रसदोषजविकारेष्वेकः**
अवयवांची ग्लानि, अनुत्साह, रसदोषापासून होणाऱ्या विकारांपैकी एक.

**–साद**–पु., **रोगलक्षण०, अङ्गसदनम्** (सुउ. २४.२३) ( अहसू. ४.१० ) गळल्यासारखे वाटणे.

**–सावर्ण्य**–न., **अङ्गसमानवर्णता** ( सुचि. ९.३८ ) अंगाच्या त्वचेच्या रंगासारखा रंग.

**अङ्गावदरण**–न., **रोग०, अङ्गस्यावदरणं स्फुटनं विदारणं च, चत्वारिंशत्पित्तविकारेष्वेकः** ( चसू. २०.१४ ) त्वचा फाटणे, पाय इ. फुटणे. ४० पित्तविकारांपैकी एक.

**अङ्गावसादन**–न., **रोगलक्षण०, अङ्गानां दौर्बल्यम्** (चचि. १.३३) अंग गळणे, अवयवांची अशक्तता.

**अङ्गार**–पु., **अग्निः** ( चसू. १४.२८ ) विस्तव.
**अभस्मसात्कृतो दग्धकाष्ठखण्डः** ( सुसू. २९.११ )
**कोकिलः** ( र. ७.१६ )
भस्म न झालेला निखारा. जळल्या लाकडाचा तुकडा.

**–कोष्ठकस्तम्भ**–पु., **अग्निकुण्डस्तम्भः** (असंसू.२६.१५) निखाऱ्यांनीं भरलेला पोकळ खांब.

**–कोष्ठी**–स्त्री., **साग्निमृण्मयकोश०, खराणां द्रव्याणां सत्त्वपातनी कोष्ठी** ( र. १०.३४–३८ ) कठीण द्रव्यांचे सत्व पाडण्याकरितां तयार केलेली कोठी.

**–ग्रन्थिक**–**वनस्पति० हिमावली** (रा.परि. १५.१८) वसु. एक वनस्पति.

**–चूडक**–पु., **प्रतुदपक्षि०** (चसू.२७.५२) एक पक्षी.

**–यान**–न., **अङ्गारपूर्णशकटिका** ( सुउ. ६४.२५ ) **अग्नियानम्** ( असंसू. ४.१८ )
निखाऱ्यांनी भरलेली शेगडी.

**–वल्लरी**–स्त्री., **वनस्पति०, भार्गी** ( ध. १.६८ ) ( रा. ६.९५ ) भारंगी.

**–वल्लिका–वल्ली**–स्त्री., **वनस्पति०, भार्गी** ( ध. १.६८ ) **महाकरञ्जः** ( ध. ५.११० )
भारंगी, मोठा करंज.

**–शूल्य**–वि., **शूलस्थं कृत्वा अङ्गारे भर्जितम्** ( चसू. २६.८४ )
सळईवर लपेटून निखाऱ्यावर भाजलेले (मांस.)

**अङ्गारकमणि**–पु., **जाङ्गमद्रव्य०, प्रवालम्** ( रा. १३.७३ ) प्रवाळ, प्राणिज द्रव्य.

**अङ्गिरस**–पु., **महर्षि०, हिमालये इन्द्रादेशाद् रसायनप्रयोगं कृतवान्.** ( चचि. १ [४] ३ )
एक महर्षि., इंद्राच्या आदेशाने हिमालयात रसायनप्रयोग करणारे ऋषि.

**अङ्गुल**–न., **मान०** ( असंशा. ७.३३ ) अंगुळी.

**–मित**–न., **अङ्गुलमानम्** ( सुशा. ६.२८ ) अंगुळभर, बोटभर, बोटा इतके.

**–राजि**–पु., **राजिमान् सर्पविशेषः** ( सुक. ४.३४ (३) एक सर्प. ( पट्टे असलेला. )

**अङ्गुलास्थि**–पु., **अङ्गुलगतमस्थि** ( का. शरीरविचय ) बोटाचे हाड.

**अङ्गुलि**–स्त्री., **हस्तपादशाखासु प्रत्यङ्ग०, प्रतिशाखायां पञ्च, मिलित्वा विंशतिः** ( सुशा. ५.४ ) **अङ्गुष्ठः, प्रदेशिनी, मध्यमा, अनामिका, कनिष्ठिका चेतिक्रमेण पञ्चाङ्गुलयः** ( सुसू. ३५.१२ ) हातपाय या शाखांचे उपांग, बोट. प्रत्येक शाखेला पांच मिळून वीस. अंगठा, दुसरे, मधले, चौथे व लहान बोट मिळून ५ बोटे.

**–त्राणक**–न., **यन्त्र०**, ( असंसू. ३४.१२. ) बोटात घालावयाचे यंत्र.

**–दाह**–पु., **रोगलक्षण०, सविषान्नपानरसस्पर्शेन कराङ्गुलीनां ज्वलनम्** ( चचि. २३.११२ ) बोटाची आग–सविष अन्नादिकांच्या स्पर्शाने होणारी.

**–पर्वन्**–न., **मान०, अङ्गुलस्य विशेषतः करमध्यमाङ्गुलस्य ( आढमल्ल ) मध्यभागः सन्धिस्वरूपः, अयं शरीरमानार्थमुपयुज्यते** ( सुसू. ३५.१२ ) ( चवि. ८.११७ ) बोटाचे पेरे. मधल्या बोटाचे पेरे, शरीराच्या मापनाकरिता उपयुक्त.

**अवयव०., अंगुलिग्रंथिः** ( सुसू. ३५.४ ) बोटाचा उंचवटा.

**अवयव०., अङ्गुलिशलाका** ( सुसू. १८.१८ ) बोटाच्या हाडांपैकी एक हाड. अंगुळीची सळईसारखी हाडे.

**–प्रमाण**–न., **प्रमाण०, अङ्गुलिः, करशाखा, तया मानम्** ( चवि. ८.११७ ) बोटभर, बोटाइतके. अंगुली म्हणजे हाताची शाखा, तिच्या मापाने मोजणें.

**–फला**–स्त्री., **वनस्पति०, निष्पावी** ( रा. परि. ७.१०० ) आबई.

**–शस्त्र**–न., **शस्त्र०, तच्च द्विविधम् (१) अन्तर्मुखसंज्ञितं कृशतरशशधरकानुकारिणाऽर्धद्वयसंहितमध्यकीलितेन मध्यमाङ्गुल्यङ्गुष्ठप्रविष्टलोहकटकनियमितं शस्त्रम् (२) एकावयवं मध्यमाङ्गुलीप्रविष्टकण्टकं शस्त्रम्** ( सुचि. १५.१२ ) अंगठा व मधले बोट यांत पकडावयाचे व केवळ मधल्या बोटात घालावयाचे असे दोन प्रकारचे शस्त्र.

**–शस्त्रक**–न., **अङ्गुलिशस्त्रम्** ( अहसू. २६.१३ ) ( असंसू. ३४-२६ ) तर्जनीत घालावयाचे शस्त्र.



**–शूल**–पु., **रोगलक्षण०** ( चसि. २.१६ ) बोटातला शूळ.

**–शोष**–पु., **रोगलक्षण०**, ( चसि. २.१६ ) बोट वाळणे, सुकणे, कृश होणे.

**–सन्धि**–पु., **शारीर०, अङ्गुलीनां सन्धिः** ( चचि. २९.२६ ) बोटामधील सांधा.

**–स्तम्भ**–पु., **रोगलक्षण०, अङ्गुलेर्निश्चलत्वम्** ( चसि. २.१६ ) बोट ताठरणे, बोटाची हालचाल न होणे.

**अङ्गुलिका**–स्त्री., **कीट० तन्नामकपिपीलिकाभेदः; तया दष्टे श्वयथुरग्निस्पर्शवद्दाहशोफौ भवतः** ( सुक. ८.३४ ) मुंगीसारखा एक किडा. हा चावला तर सूज, निखाऱ्याच्या स्पर्शासारखा दाह होतो.

**अङ्गुली**–स्त्री., **शारीर०, अङ्गुलिः** ( सुचि. ३.२४ ) बोट. अंगुळी.

**अङ्गुल्यन्तर**–न., **स्थानविशेषः** ( सुनि. १३.३२ ) दोन बोटांमधील अंतर जोडणारी तळांतील त्वचा, अंतर, पोकळी.

**अङ्गुष्ठ**–पु., **अङ्गुलिः सार्धत्र्यङ्गुलप्रमाणः** ( सुसू. ३५.१२) आंगठा. साडेतीन अंगुळाइतका.

**–मूल**–न., **अङ्गुष्ठस्य मूलभागः** ( सुसू. ३५.१२ ) अंगठ्याचे मूळ.

**–संमित**– वि., **अंगुष्ठपरिणाहा ( वर्तिः )** (चसू. ५.२४) आंगठ्याच्या घेराइतकी जाड (वात)

**अङ्गुष्ठोदरप्रमाण**–न., **प्रमाण० विंशतितमभागोनषड्यवप्रमाणम्**–५$\frac{१९}{२०}$ **यवाः** ( सु. शा. ४.४ ) आंगठ्याच्या दोन्ही पेराच्या मध्यावर–संधीवर असलेल्या भागाच्या घेराइतके. पाच पूर्णांक एकोणवीस वीसांश जवां इतके.

**अङ्घ्रि**–पु., **शारीर०, पादः** ( अहसू. २.३१ ) पाय.

**–मूलम्**–**( वृक्षादेः )** ( र. १४.९४ ) झाड इत्यादींचे मूळ.

**–बला**–स्त्री. **वनस्पति० पृश्निपर्णी** ( ध. १.९० ) पिठवण.

**अचक्षुष्य**–वि., **चक्षुषेऽहितम्** ( अहसू. ५.५५ ) डोळ्याला–दृष्टीला अहितकर.

**अचङ्क्रमणशील**–वि., **आस्यासुखी, चङ्क्रमणं गमनागमनं यो न करोति** ( च. चि. २९.८ ) जाणे, येणे, चालणे यांचा नेहमी कंटाळा करणारा, नेहमी बसून राहाणारा.

**अचरणा**–स्त्री., **योनिरोग०, अधावनाचरणादचरणा** ( चसू. १९.४ (९) **अधावनाज्जाता जन्तवः**

**योन्यां कण्डूं कुर्वन्ति, तया कण्ड्वा स्त्री अतिनरकाङ्क्षिणी भवति** ( चचि. ३०.१८ )
**श्लेष्मजा–यस्यां स्त्री ग्राम्यधर्मे पुरुषादधिका भवति, तेन बीजं न गृह्णाति** ( सुउ. ३८.१६ )
( विप्लुता, ) ( अहृउ. ३३.४९ )
योनिरोग. गुह्यभाग नित्य न धुतल्यामुळे अस्वच्छतेने कृमी होऊन हा रोग होतो. कृमींनी खाज येते. यामुळे पुरुषेच्छा फार असते. कफदोषाधिक्याने संभोगात ती स्त्री पुरुषापेक्षा जास्त ठरते म्हणून बीज ग्रहण करीत नाही.

**अचला**–स्त्री., **पार्थिवद्रव्य०, मनःशिला** ( र. १२.१०४ ) मनशीळ.

**अचिकित्स्य**–वि.. **चिकित्सितुमशक्यः, असाध्यः (रोगः) बलमांसक्षये सति अष्टौ व्याधयः चिकित्सार्थमनर्हा भवन्ति, वातव्याधिः, अपस्मारः, कुष्टम्, शोफः, उदरम्, गुल्मः, मधुमेहः, राजयक्ष्मा च ।** ( चइ. ९.८–९ )
चिकित्सेला अयोग्य–असाध्य. बलमांसक्षय असताना आठ रोग असाध्य होतात. ते हे :–वातरोग, अपस्मार, कुष्ठ, सूज, उदर, गुल्म, मधुमेह, आणि क्षय.

**अचिन्त्य**–वि., **चिन्तनशक्तिबाह्यम्, चिन्तनशक्त्यतीतः, रसवीर्यविपाकादिनियमैरचिन्तनीयप्रभावयुक्तत्वादचिन्त्यः** ( सु. शा. ३.४ )
ज्याचा विचार करता येत नाही असा. विचारशक्तीच्या आवांक्यात नसलेला. द्रव्याच्या ज्या कार्याची रसवीर्यादिकांच्या नियमांनी उपपत्ति लागत नाही असे विशिष्ट कार्य प्रभावाचे समजले जाणे हे अचिंत्य होय.

**अचिरजात**–वि., **असंपूर्णकाले जातः, विच्युतः** ( च. शा. ४.२९ )
नऊ महिने पूर्ण होण्यापूर्वी जन्मलेला, स्थानभ्रष्ट.

**अचिरप्रजाता**–वि., **अचिरप्रसूता** ( चनि. ३.१३ )
नुकतीच प्रसूत झालेली.

**अचेतन**–वि., **जडः, प्रकृतिः तत्कार्याणि च अचेतनवर्गः** ( सु. शा. १.८ ) जड, निर्जीव, प्रकृति, तिची कार्ये हा अचेतनवर्ग होय.
**हतौजो ज्वरलक्षण० जाग्रदवस्थायां स्वप्नावस्थायां च चेतनारहितो भवति; हतौजो ज्वररोगी** ( सुउ. ३९.४३. )
ज्ञानशून्य, जागेपणी व झोपेतही चेतनारहित, मूर्च्छित. ओज नष्ट झालेला ज्वरी मूर्च्छित होतो.
**निरिन्द्रियम्** ( चसू. २६.१० ) इंद्रियविरहित.

**अचेतस**–वि., **रोगलक्षण०, नष्टसंज्ञः** ( सु.चि.३४.१९ )
ज्ञानशून्य, मूर्च्छित.

**अचोक्ष**–वि., **अपवित्रम्, मलिनम्** ( सुसू. ४६.४७६ )
अपवित्र, मलिन.

**अचौक्ष**–वि., **अचोक्षम्** (सुउ.६०.५४) अपवित्र, मलिन.

**अच्छ**–वि., **अघनम्** ( चचि. १ '.१० )
दाट–घट्ट नसलेलें, पातळ.
**केवलम्** ( सुशा. १०.२२ )
मिश्रण नसलेले, केवळ तेच.
**तनु** ( सुसू. ४५.१९९ ) पातळ.
**निर्मलम्** ( चशा. ८.४८ ) मलरहित, स्वच्छ.
**केवलम्** ( चसू. १३.७ ) केवळ.
**–पान**–न., **केवलस्नेहपानम्** ( सुचि. ३१.२१ )
केवळ स्नेहाचे ( तूप, तेल, इ. ) पान–पिणे.
**–पेय**–पु., **केवलस्नेहपानम्, अच्छश्च पेयश्च** ( चक्र० चसू. १३.२६ )
**तत्पानविधिः** ( अहृसू. १६.२९–३० )
केवळ स्नेहच पिणे, त्याचा विधि.
**–वारुणी**–स्त्री., **स्वच्छसुरा** ( असंचि. ९ पृ. ५९ )
स्वच्छ–पातळ दारू.
**–सुरा**–स्त्री., **विशदं मद्यम्** ( अहृसू. ३.१२ )
पातळ दारू.
**–स्नेह**–पु., **केवलस्नेहः** ( सुचि. ३१.२१ )
केवळ स्नेह, मिश्र नव्हे, सिद्ध नव्हे.

**अच्छिद्र**–वि. **निबिडम्** ( चशा. ६.२८ ) छिद्रे नसलेले.

**अच्युतावास**–पु., **वनस्पति० पिप्पलः, अश्वत्थः** ( रा ११.११८ ) पिंपळ.

**अज**–पु., **प्राणि०, अयं वातप्रकृतिः** ( सुशा. ४.६७ )
बोकड, बकरा.
**अजचर्म धूमार्थमुपयुक्तम्** ( सुउ. ६०.३८ )
**अजपुरीषस्य क्षारो विसूचिकामुदावर्तं वाताष्ठीलां च नाशयेत्** ( चचि. १३.१६२ )
**अजबस्तिर्नामाजस्य मूत्राशयः, बस्त्याख्योपक्रमार्थमुपयुज्यते** ( चसि. ९.५२ )
**अजमांसगुणाः–अदोषलं, नातिशीतगुरुस्निग्धं शरीरधातुसामान्यादनभिष्यन्दि बृंहणं च** ( चसू. २७.६१–६३ )
**अजमांसरसो राजयक्ष्मणि प्रशस्यते** (चचि. ८.६७ )
**अजमेदो नेत्ररोगेषु रसाञ्जनार्थमुपयुज्यते** ( असंउ. १९ पृ. २४७ )
**इदं शाखादमेदसामग्र्यम्** ( चसू. २५.३८ )

**अजयकृत्प्लीहानावुभावपि नक्तान्ध्ये नेत्ररोगे शूल्यपक्वौ भक्षणार्थमुपयुज्येते** ( सुउ. १७.२६ )
**तथा च नेत्ररोगेषु तर्पणाद्युपक्रमेषूपयुज्यतेऽस्य यकृत्** ( असंउ. १९ ( पृ. २४९ )
**नक्तान्ध्येऽजयकृत्प्लीहानावञ्जनार्थमुपयुज्येते** ( सुउ. १७.२६ )
**अजरोमाणि ग्रहचिकित्सायां धूमार्थमुपयुज्यन्ते,** ( सुसू. ६०.३८ )

शेळीचे चामडे धुरीला उपयुक्त, बकऱ्याचे लेंड्यांचा क्षार अजीर्णजन्य शूल, उलटे पोट फुगणे, व वाताष्ठीला यांचा नाश करते, बकऱ्याचा मूत्राशय बस्तीच्या उपचाराकरिता उपयोगात आणला जातो. **मांसगुण**— दोषरहित, थोडे थंड, थोडे जड, थोडे स्निग्ध, मानवाच्या शारीर धातूशी समान असल्यामुळे पौष्टिक पण शरिरात गरजेपेक्षा जास्त आर्द्रता निर्माण करीत नाही. **मांसरस**— क्षयामध्ये प्रशस्त. **चरबी**— नेत्ररोगामध्ये चरबीमधून रसांजन उपयोगात आणतात. झुडपांच्या शाखा खाणाऱ्यांच्या चरबीमध्ये बकऱ्याची चरबी श्रेष्ठ, रातांधळ्यामध्ये यकृत आणि प्लीहा सळईवर भाजून खाण्यास देतात, तसेच अनेक नेत्ररोगामध्ये डोळा भरणे (नेत्रतर्पण) इत्यादी उपचारांसाठी यकृताचा उपयोग करतात, रातांधळ्यात ह्याच्या यकृत आणि प्लीहेचा अंजनाकरता उपयोग करतात. ह्याचे केस भूतबाधेत धुरी देण्यास उपयुक्त.

**अजा**—स्त्री., पशु०, छागी ( चसू. १.९३ )
**बर्करी** ( सुउ. ४१.५६ ) शेळी ( सुसू. ४५.५२ )
**अजाघृतगुणाः—दीपनीयं, चक्षुष्यं, बलवर्धनं, कासे, श्वासे, क्षये, चापि पथ्यं, पाके लघु** ( सुसू. ४५.९८ )
**अजादधिगुणाः—कफपित्तघ्नं, लघु, वातक्षयापहं, दुर्नामश्वासकासेषु हितमग्नेश्च दीपनम्** ( सुसू. ४५.६८ )
**मधुरं कषायमुष्णं मधुरपाकं रुच्यं पाचनं नेत्रदोषघ्नम्** ( ध. ६. १९१; रा. १५.२४७ )
**अजादुग्धगुणाः— शोषिणां हितं, दीपनं, लघु, संग्राहि, श्वासकासरक्तपित्तनुत्, सर्वव्याधिहरं, गोदुग्धतुल्यगुणं च, "अजानामल्पकायत्वात्कटुतिक्तनिषेवणात् । नात्यम्बुपानाद्व्यायामात्सर्वव्याधिहरं पयः ॥"** ( सुसू. ४५.५१ )
**'अजाक्षीरं शोषघ्नस्तन्यसात्म्यसंग्राहिकरक्तपित्तप्रशमनानां श्रेष्ठम्'** ( चसू. २५. ४०. )
**अजामांसगुणाः—मधुरं, नातिशीतं, स्निग्धं, लघु, रुच्यं, बल्यं, पुष्टिकरं, वातपित्तघ्नं च** ( ध. ६.३८५ रा. १७.४०५ )
**अजामूत्रं भेषजत्वेनोपयुज्यते, तत्तु कषायमधुरं, पथ्यं दोषहरणं च** ( चसू. १.१०० )
**इदं लवणानुरसं कटु, रूक्षं, तीक्ष्णोष्णं, लघु, पित्तलं च भवति, "कृमिशोफोदरानाहशूलपाण्डुकफानिलान् । गुल्मारुचिविषश्वित्रकुष्ठार्शांसि जयेल्लघु"** ( अहसू. ५.८३ )
**आघ्राणेन हिक्काशमनं भवति** ( सुउ. ५०.२२ )
**अजामेदो मूढवाते उपयुक्तम्** ( चचि. ११.२७ )
**अजालेण्डं शोषे उद्वर्तनेनोपयुक्तम्** ( का राजयक्ष्माचि ) **अजाशकृत्कषायतिक्तं हिध्माश्वासहरम्** ( असंसू. ६.१४५ )
**अजालयो बर्करीगृहम्, तत्सेवनेन शोषनाशो भवति**
**यथाहि—अजाशकृन्मूत्रपयोघृतासृङ्मांसालयानि प्रतिसेवमानः । स्नानादि नानाविधिना जहाति मासादशेषं नियमेन शोषम् ॥** ( सुउ. ४१.५६ )

**अजा**— म्हणजे बकरी, **तुपाचे गुण**— दीपक, बलवर्धक, खोकला, श्वास, क्षय ह्यांच्यात पथ्यकर, पचनास हलके, डोळ्याला हितकर, **दह्याचे गुण**— तुरट, गोड, रुचकर, पचनानंतर गोड, हलके, दीपक, पाचक अग्नीला हितकारक, उष्ण, कफपित्तनाशक, वातजक्षयनाशक, मूळव्याध, खोकला व डोळ्याचे दोष नाहीसे करणारे. **दुधाचे गुण**— हलके, दीपक, मळ घट्ट करणारे, क्षयात हितकर, श्वास, खोकला व रक्तपित्त नाहीसे करणारे, गुणाने गाईच्या दुधासारखे असते. शेळीचे शरीर लहान असून तिखट आणि कडु आहार, पाणी कमी पिणे, श्रम चांगले होणे ह्या कारणांनी तिचे दूध सर्व व्याधिनाशक आहे. शेळीचे दूध क्षयनाशक, दुधाचे सात्म्य होणे, मळ बांधणे आणि रक्तपित्त नाहीसे करणे ही कार्ये करणाऱ्या सर्व द्रव्यात श्रेष्ठ. **मांसाचे गुण**— गोड, स्निग्ध, हलके, रुचकर, थोडे थंड, बलवर्धक, पुष्टिकारक, वातपित्तनाशक. **मूत्राचे गुण**— तुरट, गोड, पथ्यकर, दोषहारक, तिखट, आणि मागाहून खारट, रुक्ष, तीक्ष्ण, उष्ण, पित्तवर्धक, कृमी, सूज, उदर, पोटफुगी, शूल, पाण्डु, गुल्म अरुचि, विष, कोड, कुष्ट, मूळव्याध आणि कफवात जिंकते. ह्याचा वास घेतल्याने उचकी नाहीशी होते. वाताचा रोध झाला असताना चरबी उपयुक्त, क्षयामध्ये

लेंडीचे उटणे उपयोगी, लेंडीचा काढा तुरट, कडु आणि उचकी, श्वासनाशक आहे. शेळ्यांच्या गोठ्यात क्षयी राहिल्याने क्षय जातो, शेळीचा मळ, मूत्र, दूध, तूप, रक्त, मांस यांचे सेवन आणि शेळ्या बांधण्याच्या गोठ्यांत राहणे तसेच स्नानादिकांमध्ये नानाप्रकारांनी ह्यांचे सेवन केले तर महिन्यामध्ये क्षय निश्चितपणे नाहीसा होतो.

**–करीष**–पु. न., **अजपुरीषम्** ( चचि. १३.१६२ ) शेळीच्या लेंड्या.

**–कर्ण**–( पु., **वृक्ष० शालभेदः** ( चवि. ८.१४४ ) **पत्रमस्य छागकर्णवत्; 'पियाल साल' 'साल' इति लोके** ( सुचि. १९.३३ ड. )
सागाचा प्रकार. याची पाने शेळीच्या कानासारखी असतात.
**सर्जः**, ( सुसू. ३८.१२ )
**'गन्धमुण्ड' इत्येके** (ड.सुचि. ९.१४) राळेचा वृक्ष.
**असनः गीलकोऽश्वकर्णः पूर्वदेशे प्रसिद्धः** ( ड. सुचि. ३४.१७ )
गीलक, अश्वकर्ण ही दुसरी नांवे आहेत. पूर्व देशात प्रसिद्ध वृक्ष. असाणा.

**–कर्णक**–पु., **वनस्पति० सर्जकः** ( रा. ९.२०४ ) राळेचा वृक्ष.
**वनस्पति०, अजशृङ्गी** ( चवि. १ ( ४ ) ७ )
**अजगन्धा, 'बोबई' इति लोके** ( ड.सुचि. १७.१४ )
**सोमसमवीर्या महौषधिः** ( सुचि. ३०.५ )
**हस्तिपर्णपलाशस्य तुल्यपर्णा द्विपर्णिनी । अजस्तनाभकन्दा तु सक्षीरा क्षुपरूपिणी । अजा महौषधिर्ज्ञेया शङ्खकुन्देन्दुपाण्डुरा ॥** (सुचि. ३०.१७–१८)

**–गन्धा**–स्त्री., **वनस्पति०, अजमोदा, 'फोफान्धी' इति केचित्** ( च. सू. २.४–५ )
**'फोफान्धा' इति ख्याता** ( चचि. २३.२१३ )
किरमाणी ओवा.
**अरण्यतुलसी** ( सुसू. ३७.१३–१५ ) रानतुळस.
**वनयवानी** ( चसू. २७.१७३ )
**वनयवानी गुणाः–सुगन्धा, रोचनी, नातिकटुका दोषोत्क्लेशिनी च** ( चसू. २७.१७३ )
**'जवानिका', 'बोथई' इत्यन्ये** (ड. सुसू.४४.१६)
रानओवा. गुण— सुगंधी, रोचक, थोडा तिखट, दोष उचंबळविणारा.
**बोथयिका, लतौषधी इत्यन्ये** ( ड. सुसू. ३७.६ )
**बोवयिका** ( ड. सुचि. ५.२८ )
**'बोवयिका' ( बोविका )** ( सुचि. १८.४८ )
**अजगन्धाया गुणाः–कटुः, उष्णा, वह्निकृत्, वातकफघ्नी, ज्वरगुल्माष्ठीलानाहशूलोदरकर्णरोगघ्नी च** ( ध. २.१०१ )
**गुण**— तिखट, उष्ण, अग्निवर्धक, कफवातनाशक, ताप, गुल्म, अष्ठीला, पोटफुगी, शूल, उदर, कानाचे रोगनाशक.
**अजगंधा**— बोबई ही वनस्पती सोमसदृशवीर्यशाली आहे. हस्तिपर्ण पळसासारखी, दोनपानांची, शेळीच्या स्तनाच्या रंगरूपाची, झुडपासारखी असते. शंख, कुंदकळी किंवा चंद्राप्रमाणे शुभ्र असते.

**–गर**–पु., **बिलेशय महासर्प० स निर्विषः, असौ ग्रसनात् शरीरप्राणहरो भवति** ( सुक, ४.३८ )
**सोऽर्शसां हितः ।** ( सुसू. ४६.७८ )
अजगर, निर्विष महासर्प, हा प्राण्यांना गिळतो. मूळव्याधीला हितकर.

**–गरी**–स्त्री., **वनस्पति०, सोमसमवीर्या महौषधिः** ( सुचि. ३०.५ )
**कपिलैः चित्रैः मण्डलैः सर्पाभा, पंचपर्णिनी, पंचारत्निप्रमाणा च भवति** ( सुचि.३०.१० )
**उत्पत्तिस्थानमस्याः सिंधुनददेवसुंदह्रदयोश्च जलान्तः** ( सुचि. ३०.३०–३२ )
सोमवल्ली सारखी महौषधि, पिंगट, चित्रविचित्र मंडले असलेली, सर्पासारखी, पाच पानांची, पाच हात लांब. स्थान—सिंधुनद, देवसुंद सरोवर यांच्या पाण्याच्या काठी.

**–गल्लि ( ल्ली )**–स्त्री., **अजगल्लिका** ( र. २५.१., सुशा. ४.४ ) क्षुद्र रोग.

**–गल्लिका**–स्त्री., **क्षुद्र रोग० तस्याः अधिष्ठानं तृतीया त्वक् श्वेता नाम ( सुनि. १३.४ ) कफवाताभ्यां स्निग्धा, सवर्णा, नीरुजा, मुद्गनिभा पिटिका जायते; एषा बालानां भवति** ( असंउ. ३६ ( पृ. ३१४ )
बालरोग. श्वेता त्वचेवर कफवाताने स्निग्ध, त्वचेच्या रंगासारखी, वेदनाविरहित, मुगासारखी पुळी होते.

**–दण्डी**–स्त्री., **वनस्पति०, ब्रह्मदण्डी** ( रा. परि. ५.४७ )
उत्कटारी सारखी कांटेरी पाने व फळे असणारी वनस्पति.

**–भक्षा**–स्त्री., **वनस्पति०, धन्वयासः** ( रा. ३.२२ ) धमासा.

**–मुदा**–स्त्री., **वनस्पति०, अजमोदा** ( र. २७.१२६ ) ओवा.

**–मोदक**–पु., वनस्पति०, अजमोदा ( चसू. २३.१८) ओवा.

**–मोदा**–स्त्री., वनस्पति० ( चसू. ४.९. [ ६ ] **यवनिका** ( सुसू. ३८.२२ ) **दीप्यकः** ( असंसू. १६. ४० ) ( अहृसू. १५.३३ ) **गुणाः— तिक्ता, कटुः, उष्णा, रूक्षा, वह्निदीपनी, रुचिकरी, कफवातघ्नी, हिक्का–आध्मान–अरुचि–कृमिजठरामयघ्नी** ( ध. २.९९ ) अजमोदा, ओवा. गुण— कडु, तिखट, उष्ण, रूक्ष, अग्निदीपक, रुचकर, कफवातनाशक, उचकी, पोटफुगी, अरुचि, कृमि, पोटाचे रोगनाशक.

**–मोदाद्वय**–न., **अजमोदा, यवानी** ( च. र. १६.५८ ) अजमोदा आणि ओवा.

**–रुहा**–स्त्री., कन्द०, अगद०, " **कन्दः श्वेतः सपिंडको भेदे चाञ्जनसन्निभः । गन्धलेपनपानैस्तु विषं जरयते नृणाम् । दष्टानां विषपीतानां ये चान्ये विषमोहिताः । विषं जरयते तेषां तस्मादजरुहा स्मृता ।**" ( सुक. १.७८ ) एक कंद. हा पांढरा, गुठळ्या असलेला, कापला तर सुरम्यासारखा काळा, याच्या वासाने, लेपाने व पिण्याने विष जिरते. दंश किंवा खानपानांतील विषाचे उपद्रव नष्ट होतात.

**–लोमी**–स्त्री., वनस्पति०, **सोमसमवीर्यमहौषधि०** ( सुचि. ३०.५ ) " **गोलोमी चाजलोमी च रोमशे कन्दसम्भवे** " ( सुचि. ३०.२३ ) **उत्पत्तिस्थानं काश्मीरस्थं क्षुद्रकमानससंसरः** ( सुचि. ३०.३३ ) सोमासारखी महौषधि. गाय, किंवा बकरीच्या केसांसारखे केस असलेला कंद. काश्मिरात लहान मानस सरोवराजवळ मिळते.

**श्वेतदूर्वा** ( सुउ.६०.४७ ) पांढरी हरळी.

**–शृङ्गी**–स्त्री., वनस्पति०, **कर्कटशृङ्गी, विषाणिका** ( चक. ११.१३ ) **मेढिकः, वल्लिपञ्चमूलेष्वेकम्.** ( सुसू. ३८.७२ ) **मेषशृङ्गी,** ( सुसू. ३७.१३–१५ ) काकडशिंगी, मेढशिंगी. वल्लीपंचमूळांतील एक.

**अजका**–स्त्री., नेत्ररोग०, **पर्यायः अजकाजातम्, नेत्रकृष्णगतो रोगः** ( सुउ. ५.३ ) काळ्या बुबुळाचा रोग.

**–जात**–पु., न., **नेत्ररोग०** ( सुउ. १. ३६. ) **अस्मिन् रोगे नेत्रकृष्णभागे अजापुरीषप्रतिमः रुजावान्, सलोहितः, लोहितपिच्छिलाश्रुः, कृष्णभागं विदार्य एकोच्छ्रायो भवति** ( सुउ. ५.१० ) **चिकित्सा—अजकां पार्श्वतो विद्ध्वा सूच्या चोदकं विस्राव्य व्रणं च सर्पिषा सह गोमांसचूर्णेन पूरयेत्; यदि अजकाजातस्य वर्त्म उच्चतां गच्छेत् तदा बहुशोऽवलिखेत्** ( सुउ. १३.३६-३७ ) काळ्या बुबुळावर शेळीच्या लेंडीसारखा वेदनायुक्त लाल, लालचिकट आसूयुक्त, काळे बुबूळ फोडून एक उंचवटा निर्माण होतो. उपचार— बाजूने सुईने पाणी काढून तुपात गाईच्या मांसाचे चूर्ण कालवून व्रणात भरावे. जर कडा वर येईल तर पुष्कळ खरडून काढावी.

**अजटा–अजटी**–स्त्री., वनस्पति०, **भूधात्री, भूम्यामलकी** ( काचि. बालग्रह. पृ. १०१ ) भुईआवळी.

**अजडा**–स्त्री., धान्य०, वनस्पति०, **शूकशिम्बी** ( चचि. २ [ २ ] १८–१९ ) भुईआवळी, खाजकुहिली, शूकशिंबी.

**अजर**–न., **सुवर्णम्** ( रा. १३.३ ) सोने.
**वि, जरारहितम्** (चचि. ३.१४) म्हातारपणरहित.

**अजरक**–न., **अजीर्णम्** ( असंचि.१८ (पृ.१०२) अजीर्ण.

**अजरण**–न., रोगलक्षण०, **अजीर्णम्** ( र. २१.११५ ) अजीर्ण.

**अजरा**–स्त्री., वनस्पति०, **जीर्णदारुः, वृद्धदारुभेदः** ( रा. १५७ ) वरधारा.

**अजस्र**–वि., **संततम्** ( असंउ. २३ (पृ. १६८) अखंड, निरंतर.

**–आहार**–वि., **अनवरताहारशीलः** ( सुशा. ४.९० ) सारखा खाणारा, खादाड.

**अजाक्षी**–स्त्री., **काकोदुम्बरिका** ( रा. ११.१४३ ) काळा उंबर, खर्वती.

**अजाजिक**–पु., **जीरकम्** ( रा. ६.१०० ) जिरे.

**अजाजी**–स्त्री., **जीरकम्** ( चसू. २.४ ) **कृष्णजीरकम्** (र.२३. ३६–३७) **यवानी** (र.१६.५८) **शुक्लजीरकम्** (रा. ६.१०२) जिरे, काळे जिरे, ओवा, पांढरे जिरे.

**अजातव्यञ्जन**–वि., **स्त्रीपुरुषभेदानुमापकलिङ्गं श्मश्र्वादिकं यस्य न संजातम्** ( चवि. ८.१२२ ) स्त्रीपुरुष-भेददर्शक चिन्ह मिशा इत्यादी नसणारा.

**अजातसार**–वि., **गर्भोत्पत्तिप्रारम्भाच्चतुर्थमासपर्यन्तं गर्भः प्रशस्तगुणरहितो मृदुधातुः साररहितश्च भवति सोऽजातसार इत्युच्यते** ( चशा. ८.२३ ) चवथ्या महिन्यापर्यंत धातूंची पूर्ण वाढ झाली नाही असा

गर्भ, हाडे इत्यादी सारवान धातु न झालेला, मऊ धातूंचा सारगुण रहित गर्भ.

**अजादनी**–स्त्री., **धन्वयासः** ( रा. ३.२२ ) धमासा.

**अजान्त्री**–स्त्री., **वृद्धदारुकः** ( ध. ४.१०७, रा. ३.१५६ ) **बस्तान्त्री** ( रा. ३.२ ) वरधारा.

**–अजिघ्रत्व**–न., **गन्धाज्ञता** (सुचि. ३९.३०) गंधज्ञानाची असमर्थता. वास न कळणे.

**अजित**–पु., **अगद०, स्थावरजङ्गमानां विषाणां जेता** (सुक. ५.६३–६५) विष जिंकणारे औषध. (वि.,) **न जितं** (सुक. २.४९) न जिंकलेले. **प्राणि०, अजितनामकः मूषिकविशेषः तस्य दंशलक्षणम् अंगकृष्णत्वं, छर्दिः मूर्च्छा, हृद्ग्रहश्च,** (सुक.७.२१) एका जातीचा उंदीर. डसल्यास अंग काळे, ओकारी, मूर्च्छा, हृदय जखडणे ही चिन्हे होतात. **सर्पिर्विशेषः** ( सुउ. ३९.२६४. ) एक सिद्ध तूप.

**अजिता**–स्त्री., **खनिज०, सौराष्ट्री** (ध. ३.१०५) तुरटी, फटकी.

**अजितात्मा**–वि., **अजितेन्द्रियः** ( सुउ. ५६.५ ) मन ताब्यात नसलेला.

**अजिन**–न., **जाङ्गमद्रव्य०, व्याघ्रादिचर्म** ( चसू. ६.१५ ) **सुखस्पर्शरोमचर्म** (अहसू. ३.१३) कातडे, वाघ इत्यादींचे कातडे. सुखकारक स्पर्श असणाऱ्या केसांचे कातडे. पु., **प्राणि०, मूषिकभेदः** (असंउ.४६) एक प्रकारचा उंदीर.

**अजिर**–पु., **मूषकविशेषः** (असंउ. ४६) एकप्रकारचा उंदीर.

**अजीर्ण**–न., **रोग०, आहारस्य अपचनम्** ( चसू. १.९२ ) **सामान्यलक्षणम्– "तस्य लिङ्गमजीर्णस्य विष्टम्भः सदनं तथा । शिरसो रुक् च मूर्च्छा च भ्रमः पृष्ठकटिग्रहः ॥ जृम्भाङ्गमर्दस्तृष्णा च ज्वरश्छर्दिप्रवाहणम् । अरोचकोऽविपाकश्च घोरमन्नविषं च तत् ॥"** ( चचि. १५.४५) **अजीर्णम्–आमं विदग्धं विष्टब्धम् इति कफपित्तानिलैः त्रिविधम् । केचित् रसशेषाजीर्णं चतुर्थमिच्छन्ति ।** (सुसू. ४६.४९८–५०१) **आमाजीर्णलक्षणम्– अजीर्णमन्नं माधुर्यं गतमामसंज्ञम् ।** ( सुसू. ४६.४९९ ) **"तत्रामे गुरुतोत्क्लेदः शोफो गण्डाक्षिकूटयोः । उद्गारश्च यथाभुक्तमविदग्धः प्रवर्तते ॥"** ( असंउ. ११.५५ ) **विदग्धाजीर्णलक्षणम्– "विदग्धे भ्रमतृण्मूर्च्छाः पित्ताच्च विविधा रुजः । उद्गारश्च सधूमाम्लः स्वेदो दाहश्च जायते" ॥** (मा.) **विष्टब्धाजीर्णलक्षणम्– "विष्टब्धे शूलमाध्मानं विविधा वातवेदनाः । मलवाताप्रवृत्तिश्च स्तम्भो मोहाङ्गपीडनम् ॥"** (मा.) **रसशेषाजीर्णलक्षणम्– आहारस्य एव पक्वस्य उर्वरितो रसो रस शेषः, तद् भवमजीर्णम् । तत्र उद्गारशुद्धावपि भक्तकांक्षा न जायते, हृद्गुरुता लालास्रावश्च भवति ।** ( सुसू. ४६.४९८–५०३ ) **"रसशेषेन्नऽविद्वेषो हृदयाशुद्धिगौरवे । यावत् संतिष्ठते ह्यस्य दुष्टोऽन्नस्य रसो हृदि । तावन्मर्माणि भिद्यन्ते विषं पीतवतो यथा ।"** (मा.) **अजीर्णहेतुः– अत्यम्बुपान–विषमाशन–वेगविधारण–स्वप्नविपर्ययैः** (सुसू. ४६.५००) **चिन्ता–शोक–भय–क्रोध–दुःखशय्या– प्रजागरैश्च मात्राभ्यवहृतं पथ्यमप्यन्नं न जीर्यति । अजीर्णोपद्रवाः– मूर्च्छा–प्रलाप–वमथु–प्रसेक–सदन–भ्रमादयः कदाचित् मरणमपि ।** ( सुसू. ४६.५०४ ) **अजीर्णचिकित्सा– "लंघनं कार्यमामे तु विष्टब्धे स्वेदनं भृशम् । विदग्धे वमनं यद्वा यथावस्थं हितं भवेत् ॥"** ( असंसू. ११.५८ ) अजीर्ण म्हणजे आहाराचे अपचन. **सामान्य लक्षण**–मलवातांचा अवरोध, अंग गळणे, डोके दुखणे, पाठ व कमर धरणे, जांभई, तहान, ताप, ओकारी, कुंथणे, अंग दुखणे, अरुचि, अन्न न पचणे, मूर्च्छा, भ्रम. **प्रकार**–चार. ( १ ) **आमाजीर्ण लक्षण**–ज्यात न जिरलेले अन्न गोड होते, ते आमाजीर्ण. जडपणा, घशाशी येणे, गाल आणि डोळ्याची खोबण ह्यावर सूज, खाल्लेल्या अन्नाचे करपट नसलेले ढेकर येतात. ( २ ) **विदग्धाजीर्ण**–छातीतून धूर निघत आहे असे वाटणे, आंबट ढेकर, घाम, दाह, भ्रम, तहान, मूर्च्छा, पित्ताची अनेक लक्षणे. ( ३ ) **विष्टब्धाजीर्ण**–पोटफुगी, शूल, मल आणि वात यांचा अवरोध, अंग ताठणे, अंग दुखणे, विचार करता न येणे, आणखी इतर वाताची चिन्हे. ( ४ ) **रसशेषाजीर्ण**–आहाराचा पक्व झालेला रस जेव्हा शरिराच्या गरजेपेक्षा अधिक असतो, शरिराकडून सर्वच्या सर्व आत्मसात केला जात नाही आणि काही रस शिल्लक राहातो त्याला रसशेषाजीर्ण म्हणतात. ढेकर शुद्ध येऊनही खाण्याची इच्छा होत नाही. हृदय जड, लाळ गळते, हृदय अशुद्ध, जोपर्यंत हृदयामध्ये असा रस असतो तोपर्यंत विष प्यालेल्या माणसाप्रमाणे त्याच्या हृदयांत वेदना होतात. **कारणे**–अवेळी कमी जास्त खाणे, अतिशय पाणी पिणे, मलादिकांचे वेग अडवणे, आणि दिवसा झोप, रात्री जागरण, चिन्ता, शोक, भय, राग, त्रासदायक

शय्या, ह्या कारणांनी पथ्याचे अन्न प्रमाणात घेऊनही जिरत नाही. **उपद्रव**–मूर्च्छा, बडबड, ओकारी, तोंडाला पाणी सुटणे, अंग गळणे, भ्रम इ. केव्हा मरण सुद्धा. **उपचार**–आमाजीर्णात लंघन, विदग्धात ओकारी, विष्टब्धात खूप शेकणे, घाम काढणे शिवाय अवस्थेला अनुसरून जे असेल ते. रसशेषाजीर्ण असता न खाता दिवसा थोडी झोप घ्यावी. व भूक लागली तर हलके व मोजके खावे.

**–कण्टक**–पु., **सिद्धयोग०** ( र. १६.११३–१५ )
एक सिद्ध औषधि योग.

**–शीलिन्**–वि., **अजीर्णाशनशीली** ( अहसू. ८.१३ )
अजीर्ण असताना खाण्याची खोड असणारा.

**अजीर्णाध्यशन**–न., **अजीर्णाशनम् अध्यशनं च** ( चसि. १२.१४ (५)
**एतद् ग्रहणीदूषणानां श्रेष्ठं** ( चसू. २५.४० )
**मुखशोषाध्मानशूलनिस्तोदपिपासागात्रसादच्छर्दतीसारमूर्च्छाज्वरप्रवाहणामविषकरं च ।**
अजीर्णावर जेवण व जेवणावर जेवण. हे ग्रहणी दुष्ट करणाऱ्यात श्रेष्ठ. तोंडाचा शोष, पोटफुगी, शूल, टोचणी, तहान, अंग गळणे, ओकारी, अतिसार, मूर्च्छा, ज्वर, आमांशाची हगवण, आमविष करणारे.

**अजीर्णाशन**–न., **व्युष्टाजीर्णे चतुर्विधे भोजनम्** ( काखि. ६.६१ )
**ग्रहणीदूषणानां श्रेष्ठम्** ( असंसू. १३.३ ) अजीर्ण झाले असताना जेवण. ग्रहणी दुष्ट करणाऱ्यात श्रेष्ठ.

**–शीलिन्**–**अजीर्णस्यापक्वस्याशनमजीर्णाशनम्, तत् शीलितुं शीलं यस्य सः ।** ( चवि. २.१२ )
अजीर्ण झाले असताना जेवण्याची खोड असणारा.

**अजीर्णाहार**–वि., **अजीर्ण आहारो यस्य** ( असंसू. १० )
ज्याचा आहार जिरला नाही असा, अजीर्णी.

**अजेय**–वि., **सिद्धघृतस्य नाम** ( सुक. २.४७–४९ )
**इदं घृतं सर्वविषहरं दूषीविषापहं विशेषेण ।**
औषधांनी सिद्ध केलेल्या एका तुपाचे नाव. हे सर्वविषहर; विशेषे करून दूषी विषनाशक आहे.

**–आख्य**–वि., **अजेयं नाम यस्य, तत्** ( सुक.१–८० ) ( असंसू. ८ ) अजेय नावाचे सिद्ध तूप.

**अज्वर**–वि., **ज्वरमुक्तः**
**"विगतक्लमसंतापमव्यथं विमलेन्द्रियम् ।**
**युक्तं प्रकृतिसत्त्वेन विद्यात् पुरुषमज्वरम् ॥"** ( चचि. ३.३२९ )
ज्वर निघालेला. **चिन्हे**–थकवा, तापणे व वेदना जाणे, इंद्रिये निर्मल होणे, व शरीर नेहमीसारखे होणे.

**अञ्जन**–न., **पार्थिवद्रव्य०, सौवीरमञ्जनम्** ( चसू. ३.५ )
सुरमा प्रकार.
**स्रोतोजमञ्जनम्** ( चसू. ५.३९ ) सुरमा प्रकार.
**रसाञ्जनम्** ( सुउ. ४५.३२ )
दारुहळदीचा काढा व दूध आटवून केलेला खवा. हे डोळ्याची शुद्धि करणारे अंजन.
**कज्जलम्** ( सुसू. १३.११ ) काजळ.
**अञ्जनप्रकाराः**–
**गुटिकारसचूर्णानि त्रिविधानि अञ्जनानि । महाबलानां रोगाणां–गुटिकाञ्जनम्, मध्यानां रसक्रियाञ्जनं, हीनानां चूर्णाञ्जनं ( नेत्ररोगेषु ) योजयेत्** ( सुउ. १८.५८, असंसू. ३२.९ ) **पुनश्च लेखनं रोपणं दृष्टिप्रसादनमिति त्रिविधमञ्जनम्** ( अहसू. २३.१०–१२ )
**स्नेहनम् इति चतुर्थम्** ( असंसू. ३२.७ )
**अञ्जनगुणाः**–**सुखं लघुनिरीक्षणं, चक्षुषा दृढं दर्शनं, नेत्ररोगेभ्यः संरक्षा च** ( सुचि. २४.१७–१९ )
**सौवीराणि सर्वाणि अञ्जनानि भृङ्गराजपत्ररसैः विशुध्यन्ति** ( र. ३.११४ )
**अञ्जनसत्त्वपातनविधिः**–
**मनःशिलासत्त्वपातनविधिवत् अञ्जनानां सत्त्वपातनं कार्यम् ।** ( र. ३.११५ )
**अञ्जनायोग्याः**–**श्रम–उदावर्त–रुदित–मद्य–क्रोध–भय–ज्वर–वेगाघात–शिरोदोषैरार्तानाम् अञ्जनं नेष्यते; रागरुक्तिमिरास्रावशूलसंरम्भाद्युत्पत्तिभयात् ।** ( सुउ. १८.६८–६९ )
**अंजनाचे प्रकार**–गुटी, चूर्ण व रसक्रिया. महा बलवान् रोगात गुटिकेचे अंजन, मध्यात रसक्रिया ( आटवलेला काढा ) अल्प बलवान् रोगांत चूर्ण अंजनाला उपयुक्त. पुन्हा चार प्रकार–दोष खरडून काढणारे, जखम भरून आणणारे व दोष नाहीसे करून दृष्टि स्वच्छ करणारे व डोळ्याला स्निग्ध करणारे. **गुण**–लहान पदार्थ ही सहज पहाता येणे. दृष्टि बळकट होणे व डोळ्याच्या रोगापासून डोळ्याचे रक्षण करणे. **शुद्धि**–सर्व सुरमे माक्याच्या पानांच्या रसात शुद्ध होतात. **सत्व पाडणे**–मनशिळेचे सत्व पाडण्याच्या विधिप्रमाणे. अंजनास **अयोग्य**–थकवा, पोट उलटे फुगणे, रडणे, मद्य पिणे, राग, भय, ज्वर, मलमूत्रादिकांचे वेग अडले असता, डोकेदुखी असताना

अंजन करूं नये, केल्यास लाली, वेदना, अंधेरी इ. दृष्टिदोष, व स्राव, शूल, सूज इत्यादि उपद्रव होतील. **व्यजनं लक्षणमिति यावत्** (सुउ.६०.२३) लक्षण.

**अञ्जनकी**–स्त्री., वनस्पति० **नीलाञ्जनिका, शारदं फलं, श्रीफलिकेति लोके. श्रीफलिका, नीली, महानीली इति यावत्** (ध. १.२३२–३४ रा. ४.३५३ पृ. ५५) **पित्तार्बुदे अस्या रसेषु घृतपानं प्रशस्तम्** (सुचि. १८.३४) काळा दाणा. पित्तात्मक अर्बुदावर याच्या रसाबरोबर तूप प्यावे.

**अञ्जना**–स्त्री., नेत्ररोग०, **अञ्जननामिका** ( सुउ. १.३७ ) रांजणवाडी.

**–नामिका**–स्त्री., नेत्ररोग०, **नेत्रवर्त्मनि जातः पिडकास्वरूपः** ( सुउ. ३.१५ ) ( असंउ. ११. पृ. ८८ )
**लक्षणानि–"दाहतोदवती ताम्रा पिडका वर्त्मसंभवा। मृद्वी मंदरुजा सूक्ष्मा ज्ञेया साऽञ्जननामिका ॥"** ( सुउ. ३.१५ )
रांजणवाडी. डोळ्याच्या पापणीवर होणारी पुळी. लक्षणे— दाह व टोचणीयुक्त, तांबडी, मृदु, थोडी वेदना असलेली लहान पुळी.
**वर्त्ममध्ये वर्त्मान्ते वा रक्तेन ताम्रा मुद्गमात्रा कण्डू–ऊषा–रुग्वती स्थिरा पिटिका.।** ( असंउ. ११ पृ. ८८ )
पापणीमध्ये किंवा शेवटी रक्तदुष्टीने तांबडी मुगाएवढी, खाज, आग, वेदनायुक्त स्थिर पुळी.

**–पत्रिका**–स्त्री., वनस्पति०, **' काजळी ' इति लोके, कार्पासीभेदः कृष्णकार्पासी,** ( र. ३०.८१ ) काळी कपाशी. काजळी.

**–पात्र**–न., उपकरण० **अञ्जनार्थं पात्रम् ; पात्रे तु कुर्यात् सौवर्णे मधुरम् , राजते अम्लम् ,मेषशृङ्गमये लवणम् , कांस्ये तिक्तम् , वैदूर्यमये अश्ममये वा कटुकम् , ताम्रमये आयसे वा कषायम् , नलप्लक्षपद्मकस्फटिकशंखान्यतमे शीतम् , एवमव्यापन्नगुणं भवत्यञ्जनम्** ( असंसू. ३२.१० )
काजळाची डबी–करंडा. सोन्याच्या करंड्यात गोड; चांदीच्यात आंबट; मेंढ्याच्या शिंगाच्यात खारट; काशाच्यात कडू; वैडूर्यमणी किंवा दगडाच्या करंड्यात तिखट; तांबे किंवा लोखंडाच्यात तुरट; नळ, नांदरुख, पद्मकाष्ठ, स्फटिक, शंख यांच्या भांड्यात थंड. असे अंजन ठेवले तर बिघडत नाही.

**–युग्म**–न., **स्रोतोञ्जनं रसाञ्जनं च** (अहृसू. १५.३७) अंजनांची जोडी. स्रोतोंजन व रसांजन.

**–वर्ति**–स्त्री., **नेत्राञ्जनविधावौषधिद्रव्याणि जले पिष्ट्वा कृता वर्तिः** ( सुउ. ११.६–७ ) औषधे पाण्यांत वाटून केलेली वात, कांडी.

**–विधि**–पु., **अञ्जनप्रयोगः** ( अहृसू. २३.१ ) अंजनाची रीति–पद्धत.

**–व्यापद्**–स्त्री., **अञ्जनदोषः** ( सुउ. १८.६९–७३ ) अंजनाने उत्पन्न होणारे दोष.

**अञ्जनाभ**–वि., **अञ्जनवर्णं, कृष्णवर्णम्** ( सुचि. २५.३६ ) अंजनाच्या रंगासारखे काळे.

**अञ्जनाभक**–न., कन्दविष० (असंउ ४०) एक विषारी कंद.

**अञ्जनादिगण**–पु., **अञ्जनादिवनस्पतीनां वर्गः**
**"अञ्जनादिर्गणो ह्येष रक्तपित्तनिबर्हणः । विषोपशमनो दाहं निहन्त्याभ्यन्तरं तथा ॥"** ( सुसू. ३८.४१–४२ )
अंजन इत्यादि वनस्पतींचा वर्ग. हा रक्तपित्तनाशक विषशामक व अंतर्दाहनाशक. अंजन–सुरमा.

**अञ्जनिका**–स्त्री., नेत्ररोग० **अञ्जनवाटी, अञ्जनपेटिका इत्यर्थः** ( असंसू. ८.९६ ) रांजणवाडी.

**अञ्जनी**–स्त्री., वनस्पति०, **कालाञ्जनी** ( रा. परि. ४.४३ ) **कटुका** ( रा. ६.५६ ) कुटकी.

**अञ्जलि**–पु., मान० ( चक. १२.९३ )
**चतुर्गुणं पलम् अञ्जलिः 'कुडव' इति पर्यायः; प्रसृतिद्वयम् कुडवप्रमाणम्** ( ड. सुचि. २९.१० )
**पलद्वयं तु प्रसृतं तद् द्वयं कुडवोऽञ्जलिः** (र. ११.७)
सोळा तोळे वजन. ओंजळभर ( माप ) २ प्रसृति= कुडव. २ पल=प्रसृत.
**सादरं करद्वययोजनम्** ( सुउ. ३७.१५ )
आदराने दोन्ही हात जोडणे.

**अञ्जलिका**–स्त्री., शलाका० **अञ्जल्याकारदर्वीविशेषः** ( असंसू. ३४.१७ )
एक सळई, यंत्रप्रकार, ओंजळीच्या आकाराची पळी.

**अञ्जलिकारिका**–स्त्री., वनस्पति० **लज्जालुः** (ध. ४.१०९) लाजाळू. अंजली करणारी.

**अञ्जलिमुख**–न., **स्वस्तिकयन्त्र०, जलकुक्कुटमुखसदृशं यन्त्रम्** ( सुसू. ७.१० )
यंत्रप्रकार. पाणकोंबड्याच्या तोंडासारखे यंत्र.

**अटजी**–स्त्री., **वनस्पति०, तुलसी, आश्चोतनार्थमुपयुक्ता** ( काखि. १३.४१ )
तुळस. डोळ्यात थेंब घालण्यास उपयुक्त.

**अटरूषक**–पु., **वनस्पति०, वासा** (ध. १.२३) अडुळसा.

**अटालत्व**–न., **विस्तृतत्वम्** ( चनि. ३.१४ )
**विवृतत्वम्** ( चशा. ४.१६ )
पसरटपणा, उघडेपणा, मोकळेपणा.

**अट्टहासक**–पु., **वनस्पति०, कुन्दः** ( रा. १०.२५६) कुंद.

**अणिमन्**–पु., **सूक्ष्मत्वम्, अणुभावत्वम्, अष्टसिद्धिषु एका** ( र. १.५३ ) सूक्ष्म होण्याची सिद्धि. अणुसारखे सूक्ष्म होणे. अष्टसिद्धींपैकी एक.

**अणिमोक्ष**–पु., **कीलमोक्षः** ( चवि. ३.३८ )
गाडीच्या कण्याची खीळ–खिळी पडणे.

**अणु**–पु., **तृणधान्य०, चीनः, अयं गुणैः श्यामाकसदृशः कषायमधुरलघुवातलः** ( चसू. २७.१७ )
वऱ्याच्या तांदुळा सारखे बारीक धान्य. तुरट, गोड, हलके, वातुळ.
**वनस्पति०, अश्मन्तकः** ( सुउ. १९.१३ ) आपटा.
**धान्य०, व्रीहिः** ( रा. १६.७९ ) भाताचा प्रकार.
**मान०, आरम्भकमानम्, सूक्ष्मं, लघु** ( र. ११.१ )
कमीतकमी, लहानांत लहान, सूक्ष्मांत सूक्ष्म, असे आरंभाचे माप.
**अतिसूक्ष्मम्** ( चवि. ७.१० ) अतीशय सूक्ष्म.
**अल्पम्** ( सुशा. ३.३ ) थोडे.

**–ज्योतिस्**–वि., **अरिष्टलक्षण०, स्तोकदृक्, अल्पतेजाः** ( असंशा. १०.२९ )
निश्चित मरण येणार असे दाखविणारे चिन्ह.
**स्वल्पप्रकाशः, ज्योतिः, सकलशरीरान्तर्गतं तेजः, मन्दप्रभः** ( चइ. ११.३ ) थोडा प्रकाश. शरीरस्थ तेज, मंदप्रभा असलेले, अकारण एकदम कमी होणे.

**–ज्योतीय**–वि., **अध्याय०** ( चइ. ११.१ )
अध्यायाचे नाव.

**–ता**–स्त्री., **अल्पता, व्याध्यादीनां मार्दवम्** ( चसू. १६.५ ) कमीपणा. रोगादिकांचे सौम्य स्वरूप.

**–तैल**–न., **योग०, अणूनां स्रोतसां हितम्, अणूनीन्द्रियस्रोतांसि प्रविशति** ( चसू. ५.५६ ) **तस्योत्पादनविधिः** ( चचि. २६.१४१ अहृसू. २०.३७ )
**तिलपरिपीडनोपकरणकाष्ठान्याहृत्यानल्पकालं तैलपरिपीतान्यणूनि खण्डशः कल्पयित्वा अवक्षुद्य महति कटाहे पानीयेनाभिप्लाव्य क्वाथयेत्, ततः स्नेहमम्बुपृष्ठाद्यदुदेति तत् सरकपाण्योरन्यतरेणादाय वातघ्नौषधप्रतीवापं स्नेहपाककल्पेन विपचेत्, एतदणुतैलमुपदिशन्ति वातरोगिषु; अणुभ्यस्तैलद्रव्येभ्यो निष्पाद्यत इत्यणुतैलम्।** ( सुचि. ४.२८ )



**अथ महापञ्चमूलकाष्ठैर्बहुभिरवदह्यावनिप्रदेशमसितमुषितमेकरात्रमुपशान्तेऽङ्गारपोह्य भस्मनिवृत्तां भूमिं विदारिगन्धादिसिद्धेन तैलघटशतेन तुल्यपयसाऽभिषिच्यैकरात्रमवस्थाप्य ततो यावती मृत्तिका स्निग्धा स्यात्तामादायोष्णोदकेन महति कटाहेऽभ्यासिञ्चेत्, तत्र यत्तैलमुत्तिष्ठेत्तत् पाणिभ्यां पर्यादाय स्वनुगुप्तं निदध्यात्; ततस्तैलं वातहरौषधक्वाथ-मांसरस–क्षीराम्लभागसहस्रेण सहस्रपाकं विपचेद्यावता कालेन शक्नुयात् पक्तुं, प्रतिवापश्चात्र हैमवता दक्षिणापथगाश्च गन्धा वातघ्नानि च; तस्मिन् सिध्यति शङ्खानाध्मापयेद्दुन्दुभीनाघातयेच्छत्रं धारयेद्वालव्यजनैश्च वीजयेद्ब्राह्मणसहस्रं भोजयेत्, तत् साधु सिद्धमवतार्य सौवर्णे राजते मृण्मये वा पात्रे स्वनुगुप्तं निदध्यात्, तदेतत् सहस्रपाकमप्रतिवारवीर्यं राजार्हं तैलम्; एवं भागशतविपक्वं शतपाकम्।** ( सुचि. ४.२९ )

**अणुतेल**–सिद्ध तेलाचे नाव, अणु म्हणजे सूक्ष्म; अशा स्रोतसांना जे हितकारक किंवा सूक्ष्म इन्द्रियांच्या स्रोतसांमध्ये जे प्रवेश करते ते अणुतेल, अणु म्हणजे सूक्ष्म. अशा तैल द्रव्यापासून जे तयार केले जाते ते अणु तेल. **तयार करण्याचा विधि**–तेल काढण्याच्या घाण्याची लाकडे घेऊन त्यांचे तुकडे करून, कुटून मोठ्या कढईत पाणी घालून कढवावे. दीर्घकालपर्यंत त्या लाकडांमध्ये जे तेल मुरलेले होते, ते पाण्याच्या वर तरंगते, ते मातीच्या पात्रानें किंवा हातानें वेगळे करून वातघ्न औषधांची चटणी घालून तेल तयार करण्याच्या पद्धतीने कढवावे. वात रोगांमध्ये चांगले.
( २ ) मोठ्या पंचमुळाची लाकडे काळ्या जमिनीवर जाळावी. अग्नि शान्त झाल्यानंतर राख काढून घ्यावी. नंतर साल्वणादि गणाने सिद्ध तेल समप्रमाण दूध घेऊन त्या जमिनीवर विपुल प्रमाणांत शिंपडावे. रात्रीनंतर त्या तेलाने भिजलेली सर्व माती मोठ्या कढईत घेऊन तिच्यावर कढत पाणी ओतावे. त्या पाण्यावर जे तेल तरंगेल ते एकत्र करून नीट झाकून ठेवावे. ते तेल पुन्हा वातहारक औषधांचा काढा, मांस रस, दूध, आंबट-रस घालून विधियुक्त असे सिद्ध करावे. असे हजार वेळा करावे म्हणजे हजारपाकी तेल तयार होते. दाक्षिणात्य वैद्य चन्दन इ वातघ्न सुगंधी द्रव्ये व उत्तरेचे वैद्य केशर कस्तुरी व वातघ्न द्रव्यांची चटणी वापरतात. हे तेल सिद्ध

झाल्यानंतर सोन्याच्या, रुप्याच्या, किंवा माती वा दगडाच्या भांड्यामध्ये व्यवस्थित झाकून ठेवावे. हे तेल सिद्ध झाले म्हणजे शंख, दुंदुभि वाजवाव्या. छत्र धारण करावे. पंख्याने वारा घालावा. हजार ब्राह्मणांना जेवण घालावे. हे अतिशय वीर्यवान, राजाला देण्यासारखे तेल बनते. हेंच तेल शंभर वेळा पचवले असता शंभर पाकी होते.

**–त्व**–न., **सूक्ष्मत्वम्, मनसो गुणः** ( चशा. ( १.१९ ) सूक्ष्मपणा.

**–द्वारा**–वि., **सूचीमुखी** ( चचि. ३०.३२ ) ( सुचि. १.४६ ) अगदी चिंचोळे तोंड असलेली ( योनी ).

**–बहुविदारित**–न., **पाटितास्थिभङ्गलक्षणम्, अणूनि बहूनि विदारणानि यस्य तत्** ( सुनि. १५.१० ) अतिशय बारीक आणि पुष्कळ तुकडे झालेले हाड. आघाताने फुटलेल्या हाडाचे लक्षण.

**–मुख**–वि., **अणु सूक्ष्मं मुखं यस्य सः** ( सुचि. १.५४ ) ज्याचे तोंड अगदी बारीक आहे असा व्रण.

**–मुष्टिक**–पु., **वनस्पति० विषमुष्टिः** ( रा. परि. ४.३९ ) कुचला.

**–रेवती**–स्त्री., **वनस्पति० दन्ती** ( रा. ६.३३९ ) दांती.

**–स्रोतस**–न., **सूक्ष्मस्रोतः** ( चक. १.५ ) अगदीं बारीक वाहिन्या.
वि.. **अत्यल्पाग्रच्छिद्रम्** ( सुचि. ३६.९ ) टोकावरचें अति बारीक छिद्र.

**अण्वस्थि**–न., **अल्पास्थि** ( सुशा. ४.१२ ) लहान हाड.

**अण्ड**–न., **जाङ्गमद्रव्य०, प्राण्याधारं वर्तुलम्** ( सुचि. २६.२६ चचि. २ ( १ ) ४९ ) अंडे.
**मुष्कः** ( सुचि. २६.२५ चचि. २ ( १ ) ४२ ) वृषण, अंड.

**–गज**–पु., **वनस्पति०, चक्रमर्दः** ( ध. ४.५ ) टाकळा, तरोटा.

**–घ्नी**–स्त्री., **रेवतीग्रहजुष्टयोनि०, यस्मिन् स्त्रिया अण्डं प्रपतति** ( कारेवतीक. ३६.३७ ) पुनःपुन्हा गर्भस्राव गर्भपात होण्याची खोड असलेली स्त्री.

**–ज**–वि., **एका जंगमयोनिः, अण्डाज्जातः अण्डजः, 'खगसर्पसरीसृपप्रभृतीन्यण्डजानि'** ( सुसू. १.३० ) अण्ड्यांतून ज्यांचा जन्म होतो ते पक्षी, सर्प इ० प्राणी.
पु., **पक्षी** ( चनि. ४.५० ) पक्षी.

**–लौहित्य**–पु., **शूकधान्य०** ( असंसू. ७.१६ ) राळे, वरी यासारखे धान्य.

**–हस्तिन्**–पु., **वनस्पति० चक्रमर्दः** ( रा. ४.८ ) टाकळा, तरोटा.

**अण्डिका**–स्त्री., **मान० चत्वारो यवाः, चत्वारो माषा इत्यन्ये** ( चक. १२.८८ ) वजन, चार जव किंवा चार उडीद इतक्या तोलाचे वजन.

**अतत्त्वाभिनिवेश**–पु., **मानसरोग० हेतुलक्षणादिरजोमोहावृतात्मनः तस्य रोगिणो दोषाः हृदयं समुपाश्रित्य, मनोबुद्धिवहाः सिराः संदूष्य तिष्ठन्ति । वृद्धाभ्यां रजस्तमोभ्यां बुद्धौ मनसि च आवृते व्याकुले हृदये अल्पचेतनो मूढो दोषैः नित्यानित्ये हिताहिते बुद्धिं विषमां कुरुते** (चचि. १०.५७–६३ ) रजोगुण व मोह यांनीं व्याप्त मनाच्या रोग्याचे दोष हृदयाचा आश्रय करून मन व बुद्धिवह शिरांना दुष्ट करतात. रज व तमोगुणाच्या वृद्धीने बुद्धि व मन आवृत होऊन हृदय व्याकुळ झाल्यामुळे चैतन्य व बुद्धि दुष्ट दोषांनी नष्ट होते. तेव्हा नित्य–अनित्य, हित–अहित विषयक, विचार विपरीत होतात.

**अतन्द्रित**–वि., **अनलसम्** ( सुचि. २.६१ ) आळस नसलेला, उद्योगी, दक्ष.

**अतर्पण**–वि., **पुष्टिक्षयकरम्, मेदोहानिकरम्** ( चसू. २१.२० ) शरीर घटक कमी करणारे, मेदोनाशक, क्षयकर असे औषध, अन्न, विहार.

**अतसी**–स्त्री., **तैलधान्य०** ( चसू. ३.१८ )
**उपनाहोपयोगि** ( चसू. १४.३६ )
**उमा** ( चसू. १३.१० )
**उष्णातसी स्वादुरसाऽनिलघ्नी पित्तोल्बणा कटुविपाका** ( सुसू. ४६.४९ )
**अतसीलेपः शूलघ्नः** ( चचि.२९.१४० )
**शोथपाचनी** ( सुसू. ३७.९ )
आळशी, अळशी, जवस.
**अतसीगुणाः–मधुरा तिक्ता उष्णा गुरुः कटुविपाका बल्या शुक्रघ्नी रक्तघ्नी पित्तकफघ्नी कुष्टघ्नी च** ( ध. ६.११५ )

**–तैल**–न., **उमाबीजतैलम् प्रमेहे शाकसिद्धार्थमुपयुज्यते** ( सुचि. ११.६ )
**तद्गुणाः–उष्णं त्वग्दोषकृत् कफपित्तकृत्** ( सुसू. ४५.११५ )
**मधुरं, कषायं, पिच्छिलं, बलासकृत्, वातघ्नं, कफकासघ्नं च** ( रा. ५.१९६ )

आळशी—अळशी—हिचे पोटीस करतात. हिचा लेप शूलनाशक, सूज पचवतो. **गुण**—गोड, कडू, उष्ण, जड, पचनानंतर तिखट, बलवर्धक, शुक्रनाशक, रक्तनाशक, पित्तकफ व कुष्ठनाशक. **हिचे तेल**—प्रमेहावर भाजीला फोडणी देण्याकरिता उपयुक्त. **तेलाचे गुण**—उष्ण, गोड, तुरट, बुळबुळित, वातघ्न, कफाचा खोकलानाशक, कफकर व त्वचेचे दोष करणारे.

**अतिकथन**—न., **बहुभाषणम्** ( सुशा. १.२५ )
फार बोलणे, बडबडणे, बडबड.

**अतिकन्दक**—पु., वनस्पति० **हस्तिकंदः** ( रा. परि. ७.३५ )
अतिशय मोठा कंद, हस्तिकंद.

**अतिकल्य**—वि., **अतिनीरोगः** ( चचि. १. ( ४ ). ३ )
अति निरोगी, अत्युत्कृष्ट आरोग्यसंपन्न.

**अतिकामा**—वि., **निवृत्तेच्छेऽपि पुरुषे मैथुनमिच्छन्ती** ( चशा. ८.६ ) पुरुषाची इच्छा नसतां संभोगानंतरही लगेच पुन्हां संभोगाची इच्छा असणारी स्त्री.

**अतिकाय**—वि., **बृहच्छरीरो मनुष्यः, प्रवृद्धलिङ्गः** ( सुउ. ३८.१८ )
फार मोठ्या शरिराचा मनुष्य, धिप्पाड, अगडबंब, फार मोठे व जाड लिंग असणारा मनुष्य.

**अतिकार्श्य**—न., **अपचयलक्षण० बलाभावः** ( सुसू. १५.३३ )
अतिकृशता, किडकिडीतपणा, रोडकेपणा, अशक्त.

**अतिकेसर–रा**—पु. स्त्री., **वनस्पति०, कुब्जकः** ( रा. १०.२४८., ध. ५.१४६ )
खूप केसर असलेला सुगंधी फुलांचा एक वृक्ष.

**अतिक्रम**—पु., **प्रमादः** ( अहृसू. १८.३८ )
अपराध, अमर्याद वागणे, मर्यादा सोडणे.

**अतिक्रान्त**—वि., **तन्त्रयुक्ति० पूर्वं भूतम्** ( सुउ. ६५.१६ )
शास्त्राच्या योजना समजून घेण्याचे जे ३२ मुद्दे—युक्त्या त्यांपैकी एक युक्ति. पूर्वी झालेले.

**अतिक्रान्तता**—स्त्री., **दूरगमनम्** ( सुनि. १५.७ )
दूर जाणे.

**अतिक्रान्तमद्य**—न., **व्यापन्नमद्यम्** ( चचि. १४.९ )
बिघडलेले मद्य.

**अतिक्रान्तावेक्षण**—न., **तन्त्रयुक्ति०, यत् पूर्वमुक्तं तदतिक्रान्तं नाम अतीतं तस्य अवेक्षणम्** ( सुउ. ६५.३१ )
पूर्वी सांगितलेले ते अतिक्रांत व त्याचे अवलोकन

**अतिक्लीब**—वि., **अतिविलम्बितोच्चारणम्** ( चसू. ८.२४ )
बोलताना एक शब्द उच्चारल्यावर फार वेळाने दुसरा शब्द उच्चारणे. ( हा दोष आहे )

**अतिक्षिप्त**—न., **अस्थिभग्न०, अतिप्रेरितं भग्नम्; द्वयोः सन्ध्यस्थ्नोः दूरगमनम्** ( सुचि. ३.१८ )
निखळलेल्या सांध्याची हाडे एकमेकांपासून अधिक दूर जाणे; दोन हाडांमध्ये अधिक अंतर उत्पन्न होणे.
**यस्मिन् सन्धिमुक्ते लक्षणम्—अतिक्षिप्ते द्वयोः संध्यस्थ्नोः अतिक्रान्तता वेदना च भवति** ( सुनि. १५.७ )
**चिकित्सासूत्रम्—अतिक्षिप्तमधोगतं चोपरि वर्तयेत्** ( सुचि. ३.१८ )
फार वेदना होतात. उपचार—खाली सुटलेले हाड वर न्यावे व बसवावे.

**अतिगति**—स्त्री., **दूरप्रवेशः** ( चसि. ५.५ )
बस्तीच्या नळीचा गुदद्वारांत मर्यादेपेक्षा अधिक आत प्रवेश होणे—आत जाणे ( हा बस्तिनळीच्या दोषाचा परिणाम. )

**अतिगन्ध**—पु., **खनिज०, गन्धकः** ( रा. १३.१६६ ) गंधक.
**वनस्पति०, भूतृणः** ( रा. ८.७३ ) रोहिसगवत.
**वनस्पति०, मुद्गरः** ( रा. १०.२१ ) एक सुगंधी फूल.

**अतिगन्धालु**—स्त्री., **वनस्पति०, पुत्रदात्री** ( रा. परि. ३. ४७ ) पांढऱ्या फुलांची वाटोळ्या पानांची अति सुगंधी वनस्पति.

**अतिगन्धिका**—स्त्री., **वनस्पति०** ( ध. २.९ )
शेरणी, हपुषा.

**अतिगुहा**—स्त्री., **शालिपर्णी** ( चचि. २३.२१३ )
**पृश्निपर्णी** ( सुसू. १९.२९ ) सालवण, पिठवण

**अतिचङ्क्रमण**—न., **अत्यधिकं संचरणम्** ( चसि. १२. ( ३ ) १४ ) पुष्कळ चाल.

**अतिचरण**—न., **मैथुनम्** ( सुउ. ३८.१६ ) संभोग.

**( अतिचरणा )**—स्त्री., **रोग० योनिरोग०, अतिव्यवायेन कुपितः पवनः स्त्रियाः योनौ शोफसुप्तिरुजः करोति** ( चचि. ३०.१९ )
**श्लेष्मजयोनिरोग०, या अतिव्यवायाद् बीजं न विन्दति, गर्भधारणं न करोति** ( ड. सुउ. ३८.१६ )
अति संभोगजन्य होणारा एक योनिरोग, वाताने सूज, वेदना व स्पर्शनाश होतो, बीजधारणा होत नाहीं. गर्भधारणा होत नाहीं.

**अतिचरा**—स्त्री., **वन स्पति०, पद्मा** ( ध. ४.९० )
सुगंधी मुळाची पाण्यात होणारी वनस्पति.

**अतिचर्या**–स्त्री., अत्यटनम् ( सुसू. २१.१९ ) खूप भटकणें.

**अतिच्छत्रक**–पु., भूतृणः ( रा. ८.७२ ) रोहिस गवत.

**अतिच्छत्रा**–स्त्री., **वनस्पति०, शतपुष्पा** (चचि. ९.४६) बडीशेप.

**अरुणकोकिलाक्षः** ( चवि. ८.१३९ ) तालीमखाना प्रकार.

**मधुरिका** ( चचि.१ ( ४ ).६ ) एक वनस्पति.

**द्रोणपुष्पीभेदः** (सुसू. १९.२९) द्रोणपुष्पीचा प्रकार.

**सोमसमवीर्यमहौषधि० उत्पत्तिस्थानम् काश्मीरस्थं क्षुद्रकमानसं सरः** ( सुचि. ३०.३२–३३ )

**"एकपत्रा महावीर्या भिन्नाञ्जनसमप्रभा । छत्राऽतिच्छत्रके विद्याद्रक्षोघ्ने कन्दसंभवे"** ॥ (सुचि.३०.१४)

**महौषधि०** ( सुचि. ३०.५ ) सोमरसासारखी. महौषधि, काश्मिरातील लहान मानससरोवराजवळ सापडते. एक पानाची, फार वीर्यवान्, फुटलेल्या सुरम्यासारखी, काळी, कंदापासून होणारी, भूतनाशक अशा छत्रा व अतिछत्रा नावाच्या २ सोम वनस्पती.

**गौतमा** ( असंउ. ९ ( पृ. ७६ ) हळद, गोरोचन.

**विषाणिका** ( अरुण. अहृसू. २९.३१ ) मेंढशिंगी.

**अतिजाड्य**–न., **रोगलक्षण०, अतिशयक्लेदः** ( सुचि. ३६.२२ ) अति ओलसर, अति जड.

**अतितन्द्रा**–स्त्री., **रोगलक्षण०, तन्द्राऽऽधिक्यम्** ( चसू. ५.३१ ) अति गुंगी.

**अतितर्पण**–न., **अतिबृंहणम्** ( सुशा. ३.१६ ) अति पौष्टिक आहाराचार.

**अतितीक्ष्णा**–स्त्री., **वनस्पति०, राजिका** ( ध. ४.६० ) मोहरी, काळी मोहरी.

**अतितीव्रा**–स्त्री., **गण्डदूर्वा** ( रा. ८.२३४ ) गांठी दूर्वा.

**अतितृप्ति**–स्त्री., **रोगलक्षण० रक्तस्रास्रुतिहेतुः** ( अहृसू. २७.३५ ) अत्यंत तृप्त होणे, पूर्ण संतोष, पोटाला तडस लागेल इतकें जेवण. हे झाल्यावर रक्तस्राव करू नये.

**अतितेजस**–न., **विद्युत्सदृशं तीक्ष्णं तेजः**

**वज्राग्निः** ( सुसू. १२.३९ ) विजे सारखा अग्नि. अति तीव्राग्नि.

**अतिथि**–पु., **खनिजद्रव्य० शिलाजतु** ( ध. ३.१६५ ) शिलाजतु.

**–व्रत**–वि., **अतिथौ यथोचितम् अर्घ्यादियुक्तं व्रतमाचरतीति अतिथिव्रतः** ( चशा. ४ ( २ ).३७ ) आतिथ्याचे व्रत, आलेल्याचा यथोचित सत्कार करण्याचे व्रत.

**अतिदग्ध**–न., **रोग०, चतुर्विधेष्वग्निदग्धेषु एकम्, 'अतिदग्धे मांसावलम्बनं गात्रविश्लेषः सिरास्नायुसन्ध्यस्थिव्यापादनमतिमात्रं, ज्वरदाहपिपासामूर्च्छाश्चोपद्रवा भवन्ति, व्रणश्च अस्य चिरेण रोहति, रूढश्च विवर्णो भवति** ( सुसू. १२.१६ ) अति प्रमाणात जळलेले; लक्षण–मांस लोंबते, अवयव निखळतो, शिरा स्नायु संधि अस्थि यांना अतिशय झळ लागते, ताप, दाह, तहान, मूर्च्छा होतात, व्रण दीर्घ काळाने रुजतो, रुजलेल्याचा वर्ण बिघडतो.

**अतिदाह**–पु., **रोग०, अतिदग्धता** ( अहृसू. ३०.४८ ) अतिप्रमाणात जळणे.

**अतिदीप्ति**–स्त्री., **अतितीक्ष्णता, अतिदीपनम्** ( अहृसू. ११.३४ ) अतिशय प्रदीप्त होणे

**अतिदीप्य**–पु., **वनस्पति०, चित्रकभेदः** ( रा. ६.१२७ ) ( **द्र० 'चित्रक'** ) चित्रक प्रकार.

**अतिदृष्टिप्रेरण**–न., **शलाकाभ्रमणे दोषविशेषः, तस्माद् रक्तस्रवणं रक्ताभरूपदर्शनं च भवति** ( असंउ. १७ ( पृ. १२८ ) दृष्टीला अति प्रेरणा. सळई अधिक फिरविल्यानें होणारा एक दोष, रक्तस्राव लाल दिसणें.

**अतिदेश**–पु., **तन्त्रयुक्ति० यत्किंचिदेव प्रकाश्यार्थमनुक्तार्थसाधनाय एव 'एवं अन्यदपि प्रत्येतव्यमिति परिभाष्यते'** ( चसि. १२.४२ ) एक विधान करून, अर्थ सांगून इतरत्रही असेच समजावे असे सांगणे.

**प्रकृतेन अनागतस्य साधनमतिदेशः** ( सुउ. ६५.१७ ) प्रस्तुत विधानाने पुढे ही असेच समजावे असे सांगणे.

**अतिदेह**–पु., **महाभोगशरीरः** ( असंसू. ६.६४ ) मोठे धिप्पाड शरीर, अगडबंब शरीर.

**अतिद्रव**–वि., **द्रवभूयिष्ठम्** ( असंसू. १०.७९ ) फार पातळ.

**अतिद्रवाशन**–न., **अतिद्रवद्रव्याणामाहारः**

**गुणाः–बहुमूत्रता, प्रतिश्यायः, विड्भेदः, पार्श्वभेदः, उत्क्लेशश्च** ( काखि. ५.३५ ) अतिशय पातळ आहार घेणे.

गुण–अतिमूत्रता, पडसे, मळ फुटणे, फासळ्यात फूट व दोष उचंबळणे.

**अतिनिद्रता**–स्त्री., **रोगलक्षण०** ( चसू. ५.३१ ) अतिशय झोप येणे

"अपच्यमानो बाहुल्यात् स्रोतांस्यावृणुते कफः ।
ततः स्रोतःसु रुद्धेषु जायते गात्रगौरवम् ।
गुरुगात्रस्य चालस्यमालस्यादतिनिद्रता"
( असंसू. ९.५२–५३ )
न पचलेला कफ स्रोतसे रुद्ध करतो, त्यामुळे अवयव जड पडतात. म्हणून आळस, व आळसाने अति झोप.

**अतिनिरूढ**–वि., बस्तिव्यापद्०, अतिविरेचनवल्लक्षणानि अस्य ( सुचि. ३८.१० )
आवश्यकतेपेक्षा निरुह बस्ति अधिक दिलेला. ( अति रेच झाल्याप्रमाणे लक्षणे होतात.)

**अतिपतित**–वि., विगतः व्यतीतः ( चवि. ५.१२८ )
गेलेला, भूतकालीन.

**अतिपत्र**–पु., वनस्पति०, हस्तिकन्दः ( रा. परि. ७.३५ )
फार मोठा कंद.

**अतिपत्रक**–पु., वनस्पति०, सागः ( रा. ९.६ ) साग.

**अतिपातित**–वि., रोगलक्षण०, अस्थिभङ्गस्य प्रकारः, यत्र अस्थि निःशेषतः छिन्नं वर्तते, भग्नम् ( सुनि. १५.१० ) हाडाचा संपूर्ण चुरा होणे.
स्थानाच्च्युतम्, अवलम्बमानम्, भग्नम् ( सुसू. १८.३० )
आपल्या स्थानातून निसटून लोंबू लागलेले हाड.

**अतिपातिन्**–वि., आशुकारि ( सुसू. ५,४१ )
ज्यात वेगाने बिघाड वाढत आहे असा व्रण.

**अतिपिञ्जर**–वि., रोगलक्षण०, बहुपिञ्जरवान् ( व्रणः ) ( चचि. २५.२४ ) तांबुस पिवळा. फार पिंगट व्रण.

**अतिपिडक**–वि., रोगलक्षण०, बहुपिडकायुक्तः ( व्रणः ) दुष्टव्रणभेदः ( चचि. २५.२४ )
पुष्कळ पुळया असलेला व्रण.

**अतिपूतिक**–वि., रोगलक्षण०, बहुपूययुक्तः ( व्रणः ) ( चचि. २५.२४ )
ज्यात अति प्रमाणात पू असतो तो ( व्रण ).

**अतिप्रताम्यत्**–वि., अत्यर्थं ताम्यन् तमः प्रपश्यन् ( सुनि. १६.६१ )
डोळ्यापुढे अतिशय अंधेरी येत असलेला रुग्ण.

**अतिप्रलाप**–पु., रोग०, अशीतिवातविकारेष्वेकः; अतिजल्पनम्, असंबद्धबहुभाषित्वम् ( चसू. २०.११ )
अतिबडबड, असंबद्ध बडबड. ऐशी वातविकारांपैकी.

**अतिप्रवयस**–वि., अतिप्रवरं वयो यस्य ( चचि. ३०.१७७ ) अतिवृद्ध.

**अतिप्रवृत्त**–वि., अतिनिर्गतम् ( सुसू. १४.३० )
अतिप्रमाणात स्रवलेले रक्त.

**अतिप्रवृत्तिः**–स्त्री.. अतियोगः ( चवि. ५.२४ )
स्रोतसातून वाहाणारे घटक शरिरातून अतिप्रमाणांत बाहेर जाणे.

**अतिप्रसङ्ग**–पु., अतिमैथुनम् ( सुउ. ५८.५१ )
अतिप्राचुर्यम्, दीर्घकालानुबन्धो वा (सुशा. २.१८)
अतिसंभोग. अतिविपुलता. दीर्घकाल संबंध.
अत्यभिधानदोषः ( चवि. ५.४ ) अतिशयोक्तिदोष.

**अतिबला**–स्त्री., वनस्पति०, बला, बलाभेदः ( चसू १५.४४ ) चिकणा.
पीतबला, बलाभेद; (सुचि. ४.१०) पिवळा–चिकणा.
कङ्कतिका ( सुक. ८.५१ ) चिकणा.
काकतिक्ता ( चचि. ३.२६७ )
गुणाः—तिक्ता, कटुः, वातघ्नी, कृमिदाहतृष्णाविषच्छर्दिक्लेदघ्नी च ( ध. १–२८६ )
मोठा चिकणा. कडु, तिखट, वातनाशक, कृमि, दाह, तहान, विष, ओकारी, ओलावा नाशक.

**अतिबाल**–वि., असंपूर्णसर्वधातुः ( चचि., २(४).४१ )
ज्याचे सर्व धातु संपूर्ण वाढले नाहींत असा लहान बाल.

**अतिबृंहित**–वि., अतिशयेन बृंहणं, अनपेक्षितमात्रया सेवनं येन कृतं सः; अतिबृंहणम् 'अतिस्थौल्यापच्चीमेहज्वरोदरभगंदरान् । कासंसंन्यासकृच्छ्रामकुष्ठादीनतिदारुणान्' करोति ( अहसू. १४.१९ )
अतिशय आणि अतिप्रमाणात पौष्टिक द्रव्ये सेवन केलेला. अतिबृंहणानें अतिस्थूलता, अपची, मेह, ज्वर, उदर, भगंदर, खोकला, संन्यास, मूत्रकृच्छ्र, आमविकार कुष्ठादि भयंकर स्वरूपात होतात.

**अतिभाष्य**–न., अत्यधिकभाषणम् ( चसि. १२.१३(१)
बाजवीपेक्षा अति प्रमाणात भाषण.

**अतिमहायोनि**–स्त्री., अतिविवृता योनिः, सान्निपातिकी योनिव्यापत्, महायोनिपर्यायः
अतिविस्तृत–मोठ्या तोंडाची योनि.

**अतिमात्र**–वि., मात्रयाऽधिकम् ( अहसू. ८.४ )
प्रमाणाने अधिक.

**अतिमात्रक**–वि., संयोगात् स्वरूपात् प्रवृत्तेः वा आधिक्यम्, ( अहसू. १.१९ )
संयोग, स्वरूप किंवा प्रवृत्तीमुळे झालेली वाढ.

**अतिमात्रप्रणीत**–वि., पुनः पुनः अतिशयेन वा प्रणिहितं ( नेत्रम् )
अति प्रमाणात किंवा वारंवार प्रवेश केलेली बस्तीची नळी.

**अतिमात्राशन**—न., **कर्म०, मात्रामतिक्रम्य आहार-ग्रहणम्** ( चसू. २५.४० )
प्रमाणापेक्षा अतिशय अधिक आहार घेणे.

**अतिमुक्त**—पु., **वनस्पति०, तिन्दुकः** ( सुचि. ३१.५ )
टेंभुरणी.
**आवन्तकः** ( सुउ. ४५.१६ )
**गुणा :—कषायः, शिशिरः, सुगन्धिः, श्रमहरः, हृद्यः, पित्तघ्नः, पित्तदाहज्वरोन्मादहिक्काच्छर्दिघ्नश्च** ( रा.१०.२६१ ) शेवंतीचा प्रकार. तुरट, थंड सुगंधी, श्रमहर, हृदयाला हितकर, पितघ्न, दाह, ज्वर, उन्माद, उचकी व ओकारी नाशक.

**अतिमुक्तक**—पु., **वनस्पति०, अतिमुक्तः** (रा. १०.२६०)
**माधवीलता, 'अवेतक' इति लोके** ( ड, सुउ. ६०.३४ ) शेवंती.
**—तैल**—न., **तैल०, आवन्तकतैलम्** (सुसू. ४५.१२०)
शेवंतीचें तेल. टेंभुरणीच्या बीचे तेल.

**अतिमुक्ता**—स्त्री., **वनस्पति०, अतिमुक्तकः**
( असंउ २ पृ. २७ ) टेंभुरणी, शेवंती.
**—तैल**—न., **स्नेह०,** ( ध. ६.१४१ )
**तद्गुणा :—शीतं, गुरु, श्लेष्मलं, केश्यं, वात-पित्तघ्नम्**
टेंभुरणीच्या बीचे तेल. थंड, जड, कफकर, केसांना हितकर, वातपित्तहर.

**अतिमुस्तक**—पु., **वनस्पति०, मुस्तकभेदः** ( असंचि. २३ )
नागरमोथा प्रकार.

**अतिमोदा**—स्त्री., **वनस्पति०, वनमल्लिका** ( रा. १०.२३६ )
**गणिकारी** ( रा. परि. १०.३१ ) रानमोगरी

**अतियव**—पु., **वनस्पति०, धान्य०, निःशूकः कृष्णारुण-यवः** ( सुसू. ४६.४३. )
कुसळविरहित. काळसर, तांबडसर जव.

**अतियोग**—पु., **वाङ्मनःशरीराणामतिप्रवृत्तिः** ( चसू. ११.३९ )
मन, इंद्रिये थकेपर्यंत कामे करणे.
**अतिप्रयोगः** ( सुचि. ३४.२२ )
रेचकादि औषधांचा अतिप्रमाणात उपयोग.
**अतिमात्रस्वलक्षणता** ( चसू. ११.४२ )
ऋतूंचे स्वरूप अतिशय वाढलेले असणे
**अतिमात्रं संयोगः** ( चसू. ११.३७ )
शरीर व काळ, द्रव्ये, कर्मे यांचा अति संबंध-संयोग येणे.

**अतिरसा**—स्त्री., **वनस्पति०, शतावरी** ( चसू. ४.१० )
**ऋद्धिः** ( चसू. ४.१० ) अष्टवर्गापैकी एक.
**जलजं यष्टिमधु** ( चचि. १०.३५ )
एक प्रकारचा ज्येष्ठमध.
**क्लीतनकं यष्टिमधुविशेषः** ( रा. ६.१८४ )
एक प्रकारचा ज्येष्ठ मध.
**रास्ना** ( ध. १.२७० ) रास्ना.
**मूर्वा** ( असंउ. १० पृ. ८४ ) मोरवेल.

**अतिरुहा**—स्त्री., **वनस्पति०, मांसरोहिणी** ( ध. ४.९४ )
एक सुगंधी द्रव्य.

**अतिरूढ**—वि., **अतिवृद्धम्** ( सुउ. ७.१६—१७ )
अतिशय वाढलेले.

**अतिरोप्य**—पु., **ये शालयः एकवारमुत्पाद्य द्विस्त्रिर्वा अन्यत्र रोप्यन्ते ते.**
**"रोप्यातिरोप्या लघवः शीघ्रपाका गुणोत्तराः ।**
**अदाहिनो दोषहरा बल्या मूत्रविवर्धनाः ॥"** ( सुसू. ४६.१८ )
एका ठिकाणी लावलेले ज्या साळीचे ( रोप ) एकदा वा अनेकदा दुसरीकडे पुन्हा लावले जाते ते.

**अतिलङ्घन**—न., **लङ्घनव्यापत्, अतिमात्रं लङ्घनम् अत्यपतर्पणम् । अतिलङ्घनाद् बलहानिः, पिपासा, मुखशोषः, तंद्रा, निद्रा, अनिद्रा वा भ्रमः क्लमः श्वासाद्युपद्रवाः कास—स्वरक्षय—च्छर्दि—हिक्कादयो भवन्ति** ( सुउ., ३९.१०० )
धातूचा क्षय व अवयवही क्षीण होऊन विकार होण्याइतके लंघन. लंघनाचे अनिष्ट परिणाम—अति लंघनाने बलक्षीणता, तहान, तोंड सुकणे, झापड, झोप येणे किंवा झोप उडणे, भ्रम, अति थकवा, श्वास, खोकला, आवाज क्षीण, ओकारी, उचकी इत्यादि विकार होतात.

**अतिलवण**—वि., **लवणभूयिष्ठम्** ( असंसू. १० )
फार खारट.

**अतिलोल**—वि., **अतिचपलः, अतिलोलुपः**
( सुउ.६०.१५) फार चपळ. अति लालचावलेला.

**अतिवर्तन**—न., **अतिप्रवृत्तिः, बहिर्गमनम्** ( चसू. १७.७७ )
मळाची अति प्रवृत्ति, दोषधातु बाहेर जाणे.
( परिव० ) **कठिनीकरणम् 'पुरीषं चातिवर्तयेत्' उष्ट्रादिपुरीषवत् कठिनं कुर्यात् इति**
( ड, सुउ. ५५.३८ ) कठिण करणे. उंट इत्या-दीच्या मळा सारखा मळ कठिण करणे.

( परिव० ) परित्यागः, 'लिङ्गानि कदाचिन्नातिवर्तते' न परित्यज्य याति इत्यर्थः
( ड. सुउ. ३९.८२ ) परित्याग, टाकणे, वातादिकांची चिन्हे सोडून इतर चिन्हे होत नाहीत.

**अतिवाक्करण**–(वि.) अतिभाषमाणः ( चचि. ९.२१ )
फार बोलणारा, वटवट करणारा, बडबडणारा.

**अतिविष**–न., वनस्पति०, अतिविषा ( चचि. ६.३८ )
अतिविष.

**अतिविषम**–वि., एकं संवृतमपरं विस्तृतम् ( चइ. ३.६ )
एक अगदी आखूड तर दुसरे फार लांब.

**अतिविषा**–स्त्री., वनस्पति० ( चसू. २५.४० )
गुणाः—तिक्ता, कटुः, उष्णा, कटुपाका, पाचनी, दीपनी, कफपित्तघ्नी, ज्वरामाऽतिसारकासविषच्छर्दिघ्नी ( ध. १.१० ) अतिविष.
गुण–कडु, तिखट, उष्ण, पचनानंतर तिखट, दीपक, पाचक, कफपित्तनाशक, ज्वर, आमातिसार, खोकला, विष, ओकारीनाशक.
श्यामाभेदः ( सुउ. ४०.३५ ) काळे तेड प्रकार.
भङ्गुरा (अहसू.१५.३५) अतिविषाचे दुसरे नाव.

**अतिवृत्तपुरीषता**–स्त्री., गुल्मपूर्वरूपलक्षण०, उदावर्तः ( चनि. ३.१५ ) मळाचे अगदी गोल खडे, लेंड्या. गुल्मरोगाचें पूर्वलक्षण, उदावर्त रोग.

**अतिवृत्ति**–स्त्री., अतिप्रवृत्तिः ( सुशा. २.१९ )
अतिमूत्र किंवा अति शौचास होणे.

**अतिशयोपवर्णन**–न., अतिरिक्तस्याऽर्थस्य ख्यापनम्
(सुउ.६५.३३) फार वर्णन करणे; वाढवून सांगणे.

**अतिशीताशिन्**–वि., अतिशीतान्नभोजी (काखि. ५.३०)
दोषाः—शूलं, कफवाताभिवृद्धिः, ग्रहणीमार्दवं, कासो हिक्का च.
थंडगार अन्न खाणारा, याचे दोष–शूल, ग्रहणी अशक्त होणे, खोकला, उचकी, कफ व वात यांची वाढ.

**अतिशुष्काशन**–न., शुष्कद्रव्यभूयिष्ठं भोजनम्
( काखि. ५.३६ ) अगदीं कोरडे अन्न खाणे.
दोषाः—विष्टम्भो मूत्रशकृद्विबन्धोऽतृप्तिश्च
दोष–वाताचा अवष्टंभ, लघ्वी व शौचाला अडणे व अतृप्ति.

**अतिश्लिष्ट**–वि., नेत्रप्रत्यासन्नम् ( चशा. १.१२३ )
अगदी डोळ्याजवळ धरलेले.

**अतिसमय**–पु., बहुभिः मिलित्वा कृतो नियमः
( चसू. ८.२५ ) बहुमताने केलेला नियम.

**अतिसरण**–न., रोगलक्षण०, अतीसारः ( र. १६.४१ )
अतिसार, हगवण.

**अतिसार**–पु., ( अतीसार ) रोग०,
निरुक्तिः—अतिसरणात् अतिसारः
( असंनि. ८.१७ )
अत्यन्तसरणात् अतीसारः ( सुउ. ४०.१ )
संप्राप्तिः—अब् धातुः अन्तरग्निं मन्दीकृत्य वातप्रेरितः सन् पुरीषयुक्तः अतीव अधःसरति ।
( सुउ ४०.६ )
उत्पत्तिकथा—आदिकाले खलु यज्ञेषु पशवः समालभनीया बभूवुः; नालम्भाय प्रक्रियन्तेस्म । ततो दक्षयज्ञं प्रत्यवरकालं मनोः पुत्राणां नरिष्यन्नाभागेक्ष्वाकुनृगशर्यात्यादीनां ऋतुषु पशूनामेवाभ्यनुज्ञानात् पशवः प्रोक्षणमवापुः । अतश्च प्रत्यवरकालं पृषध्रेण दीर्घसत्रेण यजता पशूनामलाभाद्गवामालम्भः प्रवर्तितः । तं दृष्ट्वा प्रव्यथिता भूतगणाः तेषां चोपयोगादुपाकृतानां गवां गौरवादौष्ण्यादसात्म्यत्वादशस्तोपयोगाच्चोपहताग्नीनामुपहतमनसां चातीसारः पूर्वमुत्पन्नः पृषध्रयज्ञे । ( चचि.१९.४ )
तथा चान्यत्र—
"दीर्घसत्रेण यजतः पृषध्रस्य महात्मनः । आलभ्याः पशवः क्षीणास्ततो गावः प्रकल्पिताः ॥
तासामुपकृतानां च गवामत्यर्थसेवनात् । असात्म्यत्वादथोष्णत्वाद् गौरवाच्च विशेषतः ॥ अतिस्नेहाच्च संक्षीणो जाठराग्निस्तदा किल । अतीसारः पुरोत्पन्नो दोषधातुमलाश्रयः ॥ अथ तेनैव कल्पेन सम्प्रत्येष महागदः" । संख्या–षड् अतीसाराः, वातज–पित्तज–कफज–संनिपातज–शोकज–आमजाः इति । पुनः द्विविधः सामः निरामश्च तथा सासृक् निरस्त्रश्च ।
( असंनि. ८.१४ )
पूर्वरूपाणि हृदय–नाभि–गुद–उदर–कुक्षीणां कुक्षिषु वा पीडा, गात्राणां ग्लानिः वैकल्यं वा वातस्य संनिरोधः, वर्चसः अप्रवृत्तिः, आध्मानम्, अन्नाविपाकश्च । ( सुउ. ४०.७–९ )
१ ) वातजः अतिसारः–पक्वं वा विबद्धम् अल्पाल्पं सशब्दं सशूलफेनपिच्छापरिकर्तिकं हृष्टरोमा विनिःश्वसन् शुष्कमुखः कट्यूरुत्रिकजानुपृष्ठपार्श्वशूली, भ्रष्टगुदः मुहुर्मुहुः विग्रथितम् उपवेश्यते पुरीषं वातात् । ( चचि. १९.५ )
२ ) पित्तजः अतिसारः–हारिद्रं हरितं नीलं कृष्णं रक्तपित्तोपहितमतिदुर्गन्धमतिसार्यते पुरीषं, तृष्णा-

दाहस्वेदमूर्च्छाशूलब्रध्नसंतापपाकपरीत इति । ( चचि. १९.६ )

३ ) कफजः अतिसारः–स्निग्धं, श्वेतं, पिच्छिलं, तन्तुमदामं, गुरु, दुर्गन्धं, श्लेष्मोपहितम्, अनुबद्धशूलं, अल्पाल्पम्, अभीक्ष्णम् अतिसार्यते सप्रवाहिकं, गुरूदरगुदबस्तिवङ्क्षणदेशः, कृतेऽप्यकृतसंज्ञः, सलोमहर्षः, सोत्क्लेशः, निद्रालस्यपरीतः सदनोऽन्नद्वेषी चेति । ( चचि. १९.७ )

४ ) संनिपातजः अतिसारः–अस्मिन् पुरीषं वराहस्नेहमांसाम्बुसदृशं भवति । वाताद्यतीसारत्रयलक्षणयुक्तोऽयम् अतीसारः कृच्छ्रसाध्यो भवति । ( मा )

५ ) शोकजः अतिसारः–शोकजातिसारः वातपित्तातिसारसमलिङ्गः । ( असंनि. ८.१४ )

संप्राप्तिः–

तैस्तैर्भावैः शोचतोऽल्पाशनस्य जन्तोर्बाष्पोष्मा कोष्ठं गत्वा वह्निमाविश्य तस्य रक्तं क्षोभयेत्, तच्च रक्तमधस्तात्काकणन्तीप्रकाशं ( गुञ्जाफलसंकाशं ) विड्विमिश्रं ह्यविड्वा निर्गन्धं गन्धवद्वा निर्गच्छेत्, अयं शोकोत्पन्नोऽतिसारो दुश्चिकित्स्यो वैद्यैः कष्टसाध्य इति प्रदिष्टः । ( सुउ. ४०.९३–९४ मा. )

भयजः अतिसारः–भयेन क्षोभिते चित्ते सपित्ते द्रावयेच्छकृत् । वायुस्ततोऽतिसार्येत क्षिप्रमुष्णं द्रवं प्लवम् । वातपित्तसमं लिङ्गैराहुः । (असं. ८.१३ )

६ ) आमजः अतिसारः–आमाजीर्णोपद्रुताः संप्रदुष्टा दोषाः कोष्ठं क्षोभयन्तः सन्तः कृच्छ्रात् नानावर्णं न एकशः, बहुशः, सभक्तं ससिक्थं सारयन्ति ( सुउ. ४०.१६ )

अतीसारे शकृद्वर्णाः–

हारिद्रः, हरितः, नीलः, मांजिष्ठः, मांसधावनाभः, रक्तः, कृष्णः, श्वेतः, वराहमेदःसदृशः इत्येवमादयः। ( चचि. १९.९ )

अतीसारोपद्रवाः–श्वासः, शूलं, पिपासा, क्षीणत्वं, ज्वरनिपीडितत्वम् ( सुसू. ३३.१९ )

शोफ–शूल–ज्वर–तृष्णा–श्वास–कास–अरोचक–च्छर्दि–हिक्का–मूर्च्छादयः अतीसारोपसर्गाः ( सुउ. ४०.२०–२१ )

असाध्यलक्षणानि–यस्य पुरीषं घृत–मेदो–वेसवाराम्बु तैलादिवत्, मज्जासदृशं, क्षीरतुल्यं, मधुतुल्यं, मञ्जिष्ठोपमं, मस्तुलुंगसदृशम्, आमगंधिकं, शीतम्, उष्णं, कुणपगन्धिकं, सौवीराञ्जनसदृशं, नीलादिरेखायुतं, मयूरपिच्छासदृशैः संव्यासम्, पूयतुल्यं, पङ्काभं च अस्ति । उत्साहादिरहितः असंवृतगुदः पक्वगुदत्वे सति बहिर्निर्गतोष्मकः शोफाद्युपद्रवैर्युक्तः अजितेन्द्रियश्च न चिकित्स्यः । ( सुउ. ४०.१९ )

पूर्वकालीं यज्ञांत पशु घ्यावे लागत. ते आणले गेले नाहीत. नंतर दक्षाकडील यज्ञाचे वेळी नरिष्यन्, नाभाग, इक्ष्वाकु, नृग, शर्याती इत्यादी मनुपुत्रांच्या आज्ञेने यज्ञांमध्ये पशूंचे प्रोक्षण केले गेले. त्यापुढे पशु न मिळाल्यामुळे दीर्घकालीन यज्ञ करणाऱ्या पृषध्राने गाईच घेतल्या. त्याचे ते कृत्य पाहून समस्त भूतगण दुःखी झाले. यज्ञकर्मांत उपयोगांत आणलेल्या त्या गाईंचे मांस पचनास जड, उष्ण, न मानवणारे, आणि अप्रशस्त केलेल्या उपयोगाने विषण्ण मन असलेल्या त्या भूतगणांचा जठराग्नि मंद होऊन हा अतिसार प्रथम उत्पन्न झाला.

दुसरें मत—दीर्घकालीन यज्ञ करणाऱ्या त्या पृषध्राला मिळालेले पशु क्षीण होते. म्हणून त्यांचे ऐवजी गाई आणल्या गेल्या. त्या उपकारी गाईंचे मांस बरेच खाल्ल्यामुळे, ते न मानवल्यामुळे, उष्ण व जड असल्यामुळे आणि अति स्निग्धतेमुळे जठराग्नि क्षीण झाला. व दोषधातुमलांच्या आश्रयाने हा अतिसार पूर्वी उत्पन्न झाला.

**संख्या**—वातज, पित्तज, कफज, संनिपातज, शोकज, आणि आमज असे सहा प्रकार अतिसाराचे असून त्यांतच पुन्हा साम, निराम तसेच सरक्त व निरक्त असे दोन दोन प्रकार संभवतात.

**पूर्वरूपे**—हृदय, नाभि, गुद, पोट व कुशी मध्ये किंवा संपूर्ण पोटात व कुशीत पीडा, अवयवांना थकवा किंवा ते विकल होणे, वायूचा अवरोध, मलप्रवृत्ति नसणे, पोट फुगणे व अन्न न पचणे.

१ **वातज अतिसार**—पक्व किंवा अड्डन, थोडे थोडे, शब्दयुक्त, शूलयुक्त, फेसाळ, बुळबुळित, कातरल्यासारखी पीडायुक्त शौचास होणे व अंगावर रोमांच येणे, सुस्कारे टाकणे, तोंड सुकणे, कमर, मांड्या, माकडहाड, गुडघे, पाठ, व बरगड्या यांत शूळ, अंग बाहेर येणे, आणि वारंवार गाठाळलेला मळ होणे, या लक्षणांनीं युक्त असतो.

२ **पित्तज अतिसार**—पिवळे, हिरवे, निळे, काळे, रक्तपित्तयुक्त, अति दुर्गंधयुक्त मलप्रवृत्ति व तहान, दाह, घाम, मूर्च्छा, शूल, ब्रध्न, संताप होऊन गुद पिकणे या लक्षणांनी युक्त असतो.

३ **कफज अतिसार**—स्निग्ध, पांढरा, बुळबुळीत, तंतुयुक्त, जड, दुर्गंधी, कफयुक्त; सारखा शूल, थोडे थोडे, वारंवार, पातळ शौचास होणे, कुंथणे, पोट, गुद, बस्ति व जांघाडे ह्या भागांत जडत्व, शौच होऊनही न झालेसे वाटणे, अंगावर रोमांच येणे, तोंडाला पाणी सुटणे, झोप, आळस, थकवा आणि अन्नाचा तिटकारा ह्या लक्षणांनी युक्त असतो.

४ **संनिपातज अतिसार**—ह्यात मळ डुकराची चरबी अथवा मांस धुतलेल्या पाण्यासारखा होतो, वातादि तीनही दोषांची लक्षणे असणारा हा अतिसार कृच्छ्रसाध्य असतो.

५ **शोकज अतिसार**—हा वातपित्तज अतिसाराच्या लक्षणांनी युक्त असतो.

**शोकज अतिसार संप्राप्ति**—निरनिराळ्या कारणांनी शोक करून कमी आहार घेणाऱ्या मनुष्याचा अश्रूंचा ऊष्मा कोठ्यात जाऊन जठराग्नीत शिरतो; व रक्ताचा क्षोभ करतो. गुदमार्गाने ते रक्त मलयुक्त किंवा मलरहित, वासरहित किंवा वासयुक्त, गुंजेच्या रंगासारखे लाल असे पडते. हा शोकज अतिसार कष्टसाध्य म्हटला आहे.

६ **भयज अतिसार**—भीतीने चित्तक्षुब्ध झाले असता वायु पित्तासह मळाला पातळ करून उष्ण द्रवरूपात बाहेर टाकतो. यात वातपित्तज अतिसाराची लक्षणे होतात.

७ **आमज अतिसार**—आमाजीर्णामुळे दुष्ट झालेले दोष कोठ्याचा क्षोभ करून निरनिराळ्या रंगांनी युक्त, एका वा अनेकवेळी अन्नयुक्त न पचलेल्या शितांसह मळाची प्रवृत्ति होते.

**अतिसारात मळाचे रंग**—पिवळा, हिरवा, निळा, किरमिजी, मांस धुतलेल्या पाण्यासारखा, तांबडा, काळा, पांढरा, डुकराच्या चरबीसारखा इत्यादी.

**अतिसाराचे उपद्रव**—श्वास, शूळ, तहान, क्षीणता, ताप, सूज, खोकला, अरुचि, वांती, उचकी, मूर्च्छा इ.

**असाध्यलक्षणे**—अतिसारात तूप, चरबी, मांसाची चटणी धुतल्यासारख्या पाण्याच्या रंगाचे, तेल, मज्जा, दूध, मध, मंजिष्ठ, किंवा मेंदूच्या रंगाचे, आमगंधी, थंड, उष्ण, प्रेतासारखा गंध असणारे, सुरम्यासारखे, निळ्या व इतर रंगाच्या रेषायुक्त, किंवा मोराच्या पंखासारखे चकचकित व रंगयुक्त, पुवासारखे किंवा चिखलासारखे शौचाला होते. उत्साह वगैरे नष्ट होतो, गुदमार्ग मिटला जात नाही, गुदमार्ग पिकून बाहेरून उष्ण वाटते, सूज इ० उपद्रवांचा उद्भव झाला असून तो रोगी जर इंद्रियांवर तावा ठेवणारा नसेल तर अतिसार असाध्य असतो.

**अतिसारघ्नी**–स्त्री., वनस्पति० **अतिविषा** ( ध. १.११ )
अतिविष.

**अतिसारिकी**–वि., **अतिसारविकारशमनी** ( चवि. ५.२८ )
अतिसार नाशक.

**अतिसृति**–स्त्री., **रोग०, अतीसारः** ( र. १६.६१ )
मलादि द्रव्ये फार प्रमाणात सरणे–स्रवणे.

**अतिसौरभ**–पु., **आम्रः** ( ध. ५.३ ) आंबा.

**अतिसौहित्य**–न., **अतितृप्तिः, तृप्त्यतिक्रमः** ( असंसू. ११.७ ) ( चसू. ५.७ )
गळ्याला येईपर्यंत–ओ येईपर्यंत खाणे. पोटाला तडस लागेपर्यंत जेवणे.

**अतिसंवृता**–स्त्री., **योनिव्यापत्०, अतिसंकुचितमुखी, सूचीवक्त्रा** ( सुउ. ३८.१९ )
अतिशय लहान तोंडाची योनी. सुईच्या तोंडासारखी योनी.

**अतिस्थौल्य**–न., **विंशतिश्लेष्मविकारेषु एकः** ( चसू. २०.१७ ) वीस कफ विकारांतील एक.
**अतिस्थूलता, अयं मेदोदोषजः** ( सुसू. २४.९ )
अति लठ्ठपणा. गलेलठ्ठपणा. हा मेदोदोषापासून होतो.

**अतिस्वप्न**–पु., **निद्राधिक्यम्** ( चसू. २६.४३ (१)
फार झोप.

**अतिस्वेद**–पु., **रोगलक्षण०, अतिशयेन स्वेदः, चत्वारिंशतिपित्तविकारेषु एकः** ( चसू. २०.१४ )
फार घाम. चाळीस पित्तविकारांतील एक.

**अतिस्वेदन**–न., **रोगलक्षण०, स्वेदस्य अत्यधिकत्वम्** ( चनि. ५.७ )
फार घाम काढणें. घामाचे अति आधिक्य.

**अतीत**–वि., **पतित** ( सुशा. १०.५७ ) पडलेला, गेलेला.

**अतीतकाल**–न., **निग्रहस्थानविशेषः, अतीतकालं नाम यत् पूर्वं वाच्यं तत् पश्चाद् उच्यते ।** ( चवि. ८.५८ )
प्रतिपक्षाला वादात पराभूत करावयाचे स्थान. योग्यवेळी जे बोलावयाचे ते वेळ निघून गेल्यावर बोलणें.
**व्यतिक्रान्तकालम्** ( सुचि. २४.९८ )
टळलेली वेळ. गेलेली वेळ.

**अतीतवासस्**–न., **जीर्णवस्त्रम्** ( सुचि. २४.१०१ )
जुने कापड; जुने व फाटके वस्त्र.

**अतीतागमन**–न., गतकाले जातस्य पुनरागमनम् ( चशा. १.८८ )
मागे झालेला पुन्हा होणे ( उ. थंडीताप. )

**अतीतावेक्षण**–न., तन्त्रयुक्तिविशेषः, अतीतावेक्षणं नाम यत् अतीतमेव उच्यते । ( चसि. १२.४४ )
ग्रंथ लावण्याची एक पद्धति. अगोदर सांगितलेलेच प्रकरणानुसार पुन्हा सांगणे.

**अतीन्द्रिय**–न., चक्षुरादिभ्यः इन्द्रियेभ्यः सूक्ष्मतरं, दुरवबोधम्, अतिक्रान्तम् इन्द्रियम् अतीन्द्रियम्, इन्द्रियं चक्षुरादिकम् अतिक्रम्य वर्तते इति वा । ( चसू. ८.४ )
डोळे इत्यादि इंद्रियांच्या ग्रहणशक्तीच्या पलीकडचे ( ज्ञान. ) इंद्रियांच्या आकलन शक्तीच्या बाहेरचे.

**अतीसार**–पु., अतिसारः (सुउ. ४०.६) हगवण, अतिसार.

**अतुल्यगोत्र**–वि., असगोत्रः ( चशा. २.३ )
भिन्न गोत्राचा.

**अतुल्यगोत्रीय**–पु., अध्याय० ( चशा. २.१ )
अध्यायाचे नाव. स्त्री पुरुष या विषम गोत्रीयांबद्दल माहिती.

**अतुल्यवीर्य**–वि., विषमवीर्यः ( चक. १२.५६ )
असमान वीर्याचा.

**अतृप्ति**–स्त्री., रोग० चत्वारिंशत्पित्तविकारेषु एकः ( चसू २०.१४ )
इच्छा पुरी न होणे, असंतोष, असमाधान, अपुरी इच्छा पुरी न होणे. ४० पित्तविकारांतील एक.
रोगलक्षण० ( असंसू. २०.१४ ) तृप्ति न होणें.

**अतैल**–न., सर्षपस्नेहादि ( चवि. ८.१५० )
तिळाखेरीज इतर मोहरी इत्यादिकांपासून काढलेला स्नेह–तेल इत्यादी.

**अत्यग्नि**–पु., रोग०, अतिप्रदीप्तः अग्निः, तीक्ष्णाग्निः ( चसू. २७.२१९ )
तीव्र अग्नि. जड व जास्त अन्न पचन करणारा अग्नि.

**अत्यन्तशोणित**–न., खनिजद्रव्य०, सुवर्णगैरिकम् ( ध. ३.१७० ) सोनकाव.

**अत्यम्ल**–न., वनस्पति०, वृक्षाम्लम् ( रा. ६.१४४ )
अतिआंबट. कोकम, अमसूल.

**–पर्णी**–स्त्री., वनस्पति०, गुणाः–अम्ला, तीक्ष्णा, दीपनी, रुच्या, वातश्लेष्मघ्नी, प्लीह–शूल–गुल्मघ्नी च ( रा. परिशिष्ट पृ. ३३२ ) अतिशय आंबट पानांची रानवेल.
गुण–आंबट, तीक्ष्ण, दीपक, रुचिकारक, वातकफनाशक व प्लीहा, शूल, गुल्मनाशक.

**अत्यम्ला**–स्त्री., वनस्पति०, वनबीजपूरकः ( रा. ११.३३ )
रानमहाळुंग.

**अत्यय**–पु., व्यापत्, विनाशः ( सुचि. ३७.८० ) ( सुचि. ३३.४५ ) रोग, उपद्रव, नाश.

**अत्यर्क**–पु., वनस्पति०, राजार्कः, अर्कभेदः, शुक्लार्कः ( रा. १०.२९ ) पांढरी रुई.

**अत्यर्थ**–वि., अत्यधिकम् ( चइ. ७.३० )
अतिशय, प्रमाणाबाहेर.

**–रसिक**–वि., अतिस्वादुरसयुक्तः ( चइ. २.२२ )
अतिगोड, अतिमधुर.

**–विवृत**–वि., अतिशयेन निर्गता ( चइ. ८.११ )
फार लोंबलेली.

**–संवृत**–वि., अत्यधिकान्तःप्रविष्टा ( चइ. ८.११ )
फार आत शिरलेली.

**अत्यादान**–न., अतिप्रमाणेन ग्रहणम् ( चशा. १.१२४ )
अति प्रमाणात खाणे–घेणे.
अतिच्छेदनम् (सुचि. २२.५१) अधिक तोडणे, कापणे.

**अत्यानन्दा**–स्त्री., योनिरोग०, अतिविषयसेवनेनापि तृप्तिं न गच्छति इति स्वरूपम् ( सुउ. ३८.१५ )
अतिसंभोगानेही तृप्ति–समाधान न मिळणारी.

**अत्यासन**–न., अतिमात्रम् आसनम् ( चसि. १२.१४(४)
सारखे बसून रहाणे.

**अत्युग्र**–न., वनस्पति०, हिङ्गु ( ध. २.३६ ) हिंग.
वि.,–कर्णकर्कशः, श्रुतिपरुषः ( चशा. १.११८ )
कानाला कर्कश लागणारे.

**–गन्धा**–स्त्री., वनस्पति०, गिरिकर्णी ( ध. ४.८५ )
गोकर्णी.

**अत्युत्पिण्डित**–वि., अत्यर्थनिर्गतम् ( चइं. ३.६ )
अतिशय बाहेर आलेले ( डोळे )

**अत्युल्बणानिल**–वि., अतिप्रबलवाता ( चसू. १३.६८ )
अतिशय वाताचा प्रकोप असलेली ( ग्रहणी )

**अत्युष्णगात्र**–वि., रोगलक्षण०, अत्युष्णावयवः ( सुउ. ३९.२४ )
अतिशय उष्ण झालेले आहेत अवयव ज्याचे तो ( ज्वरी )

**अत्यूह**–पु., प्रतुदपक्षिविशेषः, डाहुकः, दात्यूहः इति पाठान्तरम् । ( चसू. २७.५० )
एक पक्षी, टोचून भक्ष्य खाणारा.

**अत्रि**–पु., आयुर्वेदज्ञः महर्षि० ( चचि. १ ( ४ ) ३ )
एक मोठे ऋषि. आयुर्वेदशास्त्रज्ञ.

**–ज**–पु., **अत्रिपुत्रः** ( चचि. १२.४ )
अत्रि ऋषींचे चिरंजीव

**–पुत्र**–पु., **आत्रेयः पुनर्वसुः** ( अहृसू. १.३ )
अत्रि ऋषींचे पुत्र पुनर्वसु.

**अत्र्यात्मज**–पु., **अत्रिपुत्रः** ( चचि. १२.३ )
अत्रि ऋषीचे पुत्र.

**अथ**–अ., **च, समुच्चये** ( चचि. १२.११ )
आणि, समुच्चय दर्शक अव्यय.

**अथर्वन्**–पु., **अथर्ववेदः** ( चसू. ३०.२० ) अथर्ववेद.
**अथर्ववेदविद्** ( सुसू. ३४,६ ) अथर्ववेदज्ञ.

**अथर्वणकृत**–वि., **अथर्ववेदप्रणीताभिचारिक–मन्त्रैः कृतो मारणात्मको रोगविशेषः । 'दैवबलप्रवृत्ता ये देवद्रोहादभिशस्तका अथर्वणकृता उपसर्गजाश्च; तेऽपि द्विविधाः—विद्युदशनिकृताः पिशाचादिकृताश्च, पुनश्च द्विविधाः-संसर्गजा आकस्मिकाश्च'** ( सुसू. २४.७ )
अथर्ववेदोक्त जारणमारणाच्या मंत्रांनी उत्पन्न झालेला मारक रोग. दैवाने होणारे, देवांच्या द्रोहाने होणारे, शापादींनी होणारे, अथर्व मंत्रप्रयोगाने होणारे व उपसर्गाने होणारे रोग. हे सुद्धां २ प्रकारचे आहेत; १ वीज किंवा वज्रपाताने होणारे व २ पिशाचादि बाधेने होणारे. पुनश्च २ प्रकार; संसर्गज आणि आकस्मिक.

**अथर्ववेद**–पु., **ऋग्वेदादिचतुर्षु वेदेषु एकः** ( सुसू. १.६ )
ऋग्वेदादि चार वेदांपैकी एक वेद.
**'इह खलु आयुर्वेदो नाम उपाङ्गम् अथर्ववेदस्य'**
आयुर्वेद अथर्ववेदाचे उपांग आहे.

**अदभ्र**–पु., **श्लेष्मप्रकोपणः सौम्यकीटविशेषः** ( असंउ. ४३ पृ. ३५१ )
कफ प्रकोपी एक सौम्य किडा.

**अदिति**–स्त्री., **देवता०, सूर्यमाता** ( असंशा. १२.८ )
सूर्याची आई.

**अदृढसौहृद**–वि., **शिथिलस्नेहः** ( सुशा. ४.६५ )
दृढ मैत्री नसलेला.

**अदृढस्नेहकोष्ठ**–वि., **निर्बलस्निग्धकोष्ठः; स्नेहनं स्नेहः, दृढः स्नेहकोष्ठो यस्य स दृढस्नेहकोष्ठः । न दृढस्नेहकोष्ठोऽदृढस्नेहकोष्ठः इति** ( अरुण. अहृसू. १९. ३७ ) स्नेहाने बलवान् कोठा नसलेला, दुबळा, कमी स्निग्ध कोठा असलेला.

**अदृष्ट**–न., **सर्वजनसामान्याधर्मः; विदृष्टम्** ( सुसू. ६.१६ ) ( सुशा. ८.३ )
सामान्य जनतेकडून घडणारा अधर्म; न दिसलेले.

**–कारित**–वि., **अदृष्टेन सर्वजनसामान्येनाधर्मेण कारितं, कर्तुं प्रयोजितम्** ( ड. सुसू. ६.१६ )
दैववशात् सामान्य जनाकडून करविलेले वा करण्याचे योजलेले कृत्य.

**–शोणिता**–वि., **रोगलक्षण, शोणितदर्शनं विनाऽपि शूलं भवति यस्याः सा** ( असंशा. ४.५ )
योनिमार्गातून रक्तस्राव दिसत नसतानाही जिला शूल होत आहे ती.

**–सूर्य**–वि., **ईषद् दृष्टः सूर्यो यस्मिन तत्** ( अहृसू. ३.२४ )
ज्यात सूर्य दिसतो न दिसतो असे ( उपवन. )

**–हेतु**–पु., **प्राक्तनकर्महेतुः, अनाकलित–हेतुः** ( सुसू. २१.१० )
आकलन होत नाही असा हेतु; दैव हा हेतु.

**अदृष्टार्तवा**–वि., **ऋतुकालेऽदृष्टमार्तवं यस्याः सा** ( सुशा. ३.६ ) ऋतुकाळ असूनही जिला आर्तव दिसत नाही अशी स्त्री.

**अदृष्टार्थ**–वि., **प्रमाणान्तरेण यस्य अर्थस्योपलब्धिः न भवति सः** ( चवि. ८.३८ )
कोणत्याही पुराव्याने ज्याचे ज्ञान होऊ शकत नाही असा विषय. उ०–पुनर्जन्म किंवा मोक्षाचे अस्तित्व.

**अदृष्टिपूतना** ( **अन्धपूतना** )–स्त्री., **स्त्रीशरीरधारी ग्रहविशेषः** ( असंउ. ३ )
स्त्रीच्या आकाराचा ग्रह. ( भूत, पिशाच्च )

**अदेशिक** ( **अदैष्टिक** )–वि., **वैदेशिकः, अनुत्तमस्थाननिवासी; दुर्दैवयुक्तः** ( र. ७.३० ) ज्याचे निवासस्थान उत्तम नाही असा, विदेशी, दुर्दैवी.

**अद्धा**–अ., **अवितथम्** ( चइ. ४.४ ) खरे, खरोखर.

**अद्भुतरूप**–न,. **न कदापि यद्भवति तदद्भुतम्, आश्चर्यम्, आश्चर्यकारिरूपम्** ( च. शा. ६.२७ )
सामान्यतः जे कधीच होत नाही ते, आश्चर्यकारक रूप. आश्चर्य.

**अद्य**–न., **भक्ताद्यन्नम्** ( सुसू. ४६.४९४ )
खाण्याजोगे ( भात इ० )

**अद्यतन**–न., **वधस्थानम्** ( सुसू. २.१० )
वध करण्याचे स्थान.

**अद्रि**–पु., **पर्वतः** ( ध. ३.३४ ) ( रा. २.३५ ) पर्वत, पहाड.

**–कर्णिका**–स्त्री. **वनस्पति०, गिरिकर्णिका** ( र. २९.३४ ) गोकर्णी

**–कर्णी**–स्त्री., **वनस्पति०, गिरिकर्णी** ( रा. ३.१२३ )
गोकर्णी

**–ज**–न., **महारसविशेषः शिलाजतु** ( र. २.१ )
शिलाजतु

**–( जा )**–स्त्री., **सैंहली पिप्पली** ( रा. ६.१२० )
सिंहली पिंपळी.

**–जतु**–न., **शिलाजतु** ( चचि. १६.१८ ) शिलाजित

**अधरगुद**–न., **शारीर०, येन पुरीषं निष्क्रामति तत्, पञ्चदशकोष्ठाङ्गेष्वेकम्** ( चशा. ७.१० )
गुदाचा खालचा भाग. ( ज्याने मळ बाहेर टाकला जातो. ) एक कोष्ठांग.

**अधरवासस्**–न., **शरीरस्याधो नाभेर्धारितं वस्त्रम्** ( असंसू. ३.९३ )
नाभीचे खाली नेसलेले वस्त्र ( धोतर इ. )

**अधरौष्ठ**–पु., **अधस्तनः ओष्ठः** ( सुसू. ३१.५ )
खालचा ओठ.

**अधर्म**–पु., **पापम्** ( सुशा. १.१६ )
**कायवाङ्मनसां दुश्चरितम्** ( सुसू. ६.१९ )
**पूर्वजन्मकृतं पापम्** ( सुशा. ३.३६ )
**ऐहिकः अधर्मः** ( चवि. ३.२० )
अधर्म, पाप, कायावाचामनाने वाईट वागणे, पूर्वजन्माचे पाप, इहलोकीचे पाप.

**अधस्**–अव्य., **अधस्तात्** ( सुउ. ३९.२११ )
**अल्पम्, अर्वाक्** ( सूचि. ३७.१०२ )
खालचा, थोडा, अलीकडचा.

**( अधः ) काय**–पु., न., **शरीरस्याधोभागः** ( सुशा. ६.२६ ) शरिराचा खालचा भाग.

**–कायशोष**–पु., **लक्षण०, सक्थिशाखावयवस्य शोषः,**
मांड्यासह खालचा पायाचा भाग सुकणें.
**शुष्कत्वम्,–नितम्बमर्मविद्धस्य लक्षणम्** ( सुशा. ६.२६ )
ढुंगणातील मर्मस्थानी आघात झाल्याचे चिन्ह.

**–पात**–पु., **पारदसंस्कार०, अधःपातनम्** ( र. ९.९ )
पाऱ्यावरील एक संस्कार. औषधीत खललेला पारा अधःपातन यंत्राच्या वरच्या मडक्याच्या बुडाला लावून, त्या मडक्यावर अग्नि पेटवून, वाफेने खालच्या मडक्यात आणणे.

**–पातन**–न., **पारद संस्कार०** ( र. २.३४ )
पहा 'अधःपात'

**–पातनकोष्ठी**–स्त्री., **यन्त्र,० अङ्गारकोष्ठीभेदः** ( र. २.३४ )
अभ्रकादिकांचे सत्व तयार होऊन खाली कोठीच्या भागातच पडावे अशी कोठी. मोठी मूस.

**–पुष्पी**–स्त्री., **वनस्पति० गोजिह्वा** ( रा. ६.१८० )
पाथरी.

**–शय**–वि., **अधोमुखशायी** ( सुउ. २७.१३ ड )
तोंड खाली करून झोपणारा

**–शल्य**–पु., **वनस्पति० अपामार्गः** ( ध. १.२६० )
आघाडा.

**–शोधन**–परिव० न., **अधःशोधनं नाम विरेचनास्थापनम्** ( सुचि. २.८६ )
रेचक किंवा शोधन बस्तीने गुदद्वाराने केलेली शुद्धि.

**–स्रंसिन्**–वि., **विष्यन्दनशीलम्** ( चसू. २६.४३.(३)
खाली पाझरणारे, स्रवणारे.

**( अधो ) गतिस्वभाव**–वि., **अर्वाग्गमनशीलम्** ( सुसू. ४१.४ (१)
खाली खाली जाण्याचा स्वभाव असणारे.

**–गुडा**–स्त्री., **वनस्पति०, वृद्धादारक** ( चसू. १.७७ )
वरधारा.

**–भक्त**–वि., **भैषज्यकाल० भक्तस्यानन्तरम्** ( सुउ. ६४.७० ) ( काखिल. ३.४७. )
जेवणानंतर.
**व्यानाख्ये विगुणे प्रातराशस्यान्ते, उदानाख्ये विगुणे सायमाशस्यान्ते, तत् पूर्वकायस्य बलाधानार्थं तद्गतेषु व्याधिषु श्लैष्मिकेषु च प्रशमाय स्थूलीकरणार्थं च।** ( असंसू. २३. )
व्यान वायूच्या विकृतीत सकाळच्या जेवणानंतर, उदानाच्या विकृतीवर संध्याकाळच्या जेवणानंतर औषध घ्यावे. ते शरिराच्या भागातील वरच्या अवयवांचे बळ वाढवते, त्यातील रोगांवर, कफज रोगांवर व स्थूल होण्याकरिता उपयुक्त.

**–भाग**–वि., **अधो गुदेन दोषनिर्हरणं भजत इति** ( चक. १.४ ) गुदमार्गाने–अधोमार्गाने दोष निर्हरण करणारे ( रेचक ).

**–भागहर**–वि., **विरेचनम्** ( सुसू. ३९.४ )
अधोभागातील दोष हरण करणारे ( रेचक )

**–भागिक**–वि., **विरेचनद्रव्यम्** ( सुचि. ३४.६ )
पहा 'अधो भागहर.'

**–भाज**–वि., **निम्नगतिमत्** ( चसू. २६.४१ )
खालचे बाजूस जाणारा.

**–मुखा**–स्त्री., **वनस्पति० गोजिह्वा** ( रा. ६.१८० )
गोजिव्हा, पाथरी.

**अधारणत्व**–न., **धारणाशक्तेरभावः** ( चवि. ८.१८ )
धारणा शक्तीचा अभाव.

**अधिक**–न. वि., **वाक्यदोषप्रकारः अधिकं नाम यन्न्यून-विपरीतम्, यद्वाऽऽयुर्वेदे भाष्यमाणे बार्हस्पत्यमौशनसमन्यद्वा यत्किंचिदप्रतिसंबद्धार्थमुच्यते यद्वा पुनः प्रतिसंबद्धार्थमपि द्विरभिधीयते तत्पुनरुक्त-दोषत्वादधिकम्** ( चवि. ८.५४ )
वक्त्याच्या वाक्यातील जे दोष असतात त्या अनेक दोषांपैकी एक दोष. आयुर्वेदातील विषय बोलत असतां बार्हस्पत्य किंवा औशनसमतविषयक किंवा इतर शास्त्रातील असंबद्ध अर्थ सांगणे किंवा संवद्ध अर्थ पुनः उगीचच सांगणे. पुनरुक्ति करणे.
वि., **अतिरिक्तः** ( सुनि. १६.२४ )
नित्यापेक्षा अधिक.

**–दन्त**–पु., **दन्तमूलगतरोग०** ( सुचि. २२.२३ )
**'अधिदन्त' द्रष्टव्यः**
दातांच्या स्वाभाविक संख्येपेक्षां अधिक दात येणे.

**–दन्तता**–स्त्री., **दन्तानां संख्याधिक्यम्** ( कासू. २०.६ )
दातांच्या संख्येचे आधिक्य. अधिक दात येणे.

**–मांसज–अर्मन्**–न., **नेत्रशुक्लगतरोग०, अधिमांसार्म** ( सुउ. ४.६ )
डोळ्याच्या पांढऱ्या भागावर मांस वाढणे, वडस.

**अधिकण्टक**–पु., **वनस्पति०, धन्वयासः** ( ध. १.२२ )
धमासा.

**अधिकरण**–न., **आधारः** ( सुसू. ३५.३५ ) आधार.
**तन्त्रयुक्ति०, यमथमधिकृत्योच्यते तदधिकरणम्** ( चसि. १२.४१ ) ( सुउ. ६२.८ )
जो विषय–मुद्दा विवेचनाकरिता आधारभूत असतो– ज्या बद्दल सांगितले जाते तो.
**स्थानम्, अंगम्, आशयो वा द्रव्याणि यत्र कर्म कुर्वन्ति तदधिकरणम्**(चसू. २६.१३; सुसू. ४१.५)
स्थान, अंग, किंवा आशय, दोषधातुमल, इंद्रिये व मूर्तामूर्त भाव, यांपैकी द्रव्ये ज्यावर कार्य करतात ते अधिकरण.
**सिद्धान्त**–पु., **यस्मिन्नधिकरणे प्रस्तूयमानेऽन्यान्यप्यधिकरणानि सिद्धानि भवन्ति** ( चवि. ८.३७ )
ज्या सांगितलेल्या मुद्यावर किंवा सिद्धांतावर दुसरेही मुद्दे किंवा सिद्धांत सिद्ध होतात ते. जसे–जो मुक्त झाला तो पूर्व कर्मबंधनात नसतो. असे म्हटले की कर्मफल, मोक्ष, पुरुषाचा पुनर्जन्म इ० आपोआपच सिद्ध होतात.

**अधिकाङ्ग**–वि., **प्राकृतापेक्षयाऽधिकेनाङ्गेन युक्तः** ( असंशा. २.५४ )
नित्याच्या अवयवांपेक्षा एकादा अवयव अधिक असणे ( सहावे बोट इ० )

**अधिकार**–पु., **अधिकरणम्, विषयः** ( चवि. ७.८ )
**योग्यत्वम्** ( सुसू. २६.७ )
योग्यता, विषय, अधिकरण, अधिकार.

**अधिजिह्व**–पु., **जिह्वागतरोग० जिह्वायाः प्रबन्धनेऽधस्ताज्जिह्वाङ्ग (ग्र) तुल्यः शोफः सहाङ्कुरः कफपित्त-रक्तैर्लालोषास्तम्भयुतः खरस्पर्शयुतो रुक्कण्डूभ्यां युतः वाक्याहारविघातं करोति** ( असंउ २५ )
जिभेचा रोग–जिभेच्या बंधनावर खालीं जिभेच्या टोकासारखी अंकुरयुक्त सूज येते. वेदना, खाज, दाह, ताठरपणा, खरखरीतपणा असतो, लाळ गळते, आहार घेणे, बोलणें यांस अडथळा होतो, कफ-पित्तरक्तदोषांनी हा होतो.
**कण्ठगतरोग०** ( सुनि. १६.५२ )
घशांतील रोग.

**अधिजिह्विका**–स्त्री., **रोग०, अधिजिह्वसंज्ञः** ( चचि. १२.७७ )
जिभेच्या खालच्या भागातील विकार

**अधिदन्त**–पु., **अस्थिप्रदोषजदन्तमूलगतरोग०** ( चसू. २८.१६ ) ( सुनि. १६.२४ )
अस्थिधातुदुष्टीने दाताच्या मुळाशी होणारा रोग.
**अधिको दन्तः सोऽधिदन्ताख्यो रोगः तस्यैव वर्धनः, वर्धनकः, खलिवर्धनः, खलवर्द्धन इति पर्यायाः । तत्र अधिदन्ते जायमाने रुग् जायते जातमात्रे सा प्रशाम्यति ।** ( मानि. असंउ. २५ )
दाताच्या स्वाभाविक संख्येपेक्षा अधिक दात येणे. तो येत असता वेदना होते, व आल्या नंतर थांबते. पर्यायी नावे वर आहेत. वर्धनक इ०

**अधिदैवत**–न., **अधिष्ठात्री देवता, यथा–बुद्धेर्ब्रह्मा, अहंकारस्य ईश्वरः, मनसश्चन्द्रमाः, दिशः श्रोत्रस्य, त्वचो वायुः, सूर्यश्चक्षुषः, रसनस्यापः, पृथिवी घ्राणस्य, वाचोऽग्निः, हस्तयोरिन्द्रः, पादयोर्विष्णुः, पायोर्मित्रः, प्रजापतिरुपस्थस्येति ।** ( सुशा. १.७ )
विशिष्ट कार्यकारी देवता. पुढे 'अधिभूत' पहा.

**अधिपति**–पु., **ग्रीवां प्रत्यूर्ध्वं सद्यःप्राणहरं संधिमर्म ।** ( सुशा. ६.६; ७, ९ )

मस्तकाभ्यन्तरोपरिष्टात् सिरासन्धिः; संनिपातो रोमावर्तोऽधिपतिः; तत्रापि सद्योमरणम्। संख्याया एकमर्धाङ्गुलप्रमाणं च तत् ( सुशा. ६.२७ )
आघाताने मरण आणणारे डोक्यातील मर्म. डोक्यावरील केसांचा भोवरा जेथे दिसतो तेथे आत मेंदूचे हे संधिमर्म आहे. याला रोमावर्त असेही म्हणतात. यावर आघात झाला तर मरण येते, अर्ध्या बोटाएवढे हे मर्म आहे.

**अधिभूत**–न., बुध्द्यहंकारमनःश्रोत्रादिज्ञानेन्द्रियपञ्चकवागादिकर्मेन्द्रियपञ्चकानां विषयाः ( सुशा. १.७ )
बुद्धि अहंकार मन आणि श्रोत्रादि ज्ञानेंद्रिये व वाचा इत्यादि कर्मेंद्रिये यांचे विषय.

**अधिमन्थ**–पु., नेत्ररोग० ( सुसू. १४.३० )
अभिष्यन्दस्यैव अचिकित्सितस्य तीव्रं स्वरूपमधिमन्थः ( सुउ. ६.११ )
ऊर्ध्वजत्रुगानामङ्गानां चातिमन्थनादधिमन्थः ( असंउ. १९ )
सामान्यलक्षणम्–नेत्रमुत्पाट्यत इव, अत्यर्थं निर्मथ्यत इव, शिरसोऽर्धं च निर्मथ्यत इव वेदना ( सुउ. ६.११ )
सर्वेऽधिमन्था यथास्वमभिष्यन्देभ्योऽधिकवेदना भवन्ति, शङ्खदन्तकपालेषु अतिरुजकराश्च ( असंउ. १८ )
अधिमन्थाश्चत्वारः वात–पित्त–कफ–रक्तभेदेन ( सुउ. ६.३ )
वातजाधिमन्थलक्षणम्–नेत्रस्योत्पाटनं, मन्थनं, संघर्ष–तोद–निर्भेद–मांससंरब्धाविलाकुञ्चनं–आस्फोटन–आध्मान–वेपथु–व्यधनेत्यादिलक्षणानि शिरसोऽर्धभागे भवन्ति ( सुउ. ६.१२–१३ )
कर्णयोर्नदनं भ्रमः ललाटाक्षिभ्रुवादयः अरण्या मथ्यन्त इव ( असंउ. १८ )
पित्तजाधिमन्थ लक्षणम्–नेत्रं रक्तराजिचितं, स्रावि, वह्निनेवावदह्यते, दाहि, यकृत्पिण्डोपमं, क्षारेणाक्तं यथा क्षतं तद्वत्, प्रपक्वोच्छूनवर्त्मान्तं, सस्वेदं, पीतदर्शनं, मूर्च्छाशिरोदाहयुतं च भवति ( सुउ. ६.१४–१५ ) ( असंउ. १८ )
कफजाधिमन्थलक्षणम्–नातिसंरब्धं ( नातिक्षुब्धं ) नेत्रं, स्रावः, कण्डूः, शैत्यं, गौरवं, पैच्छिल्यं, दूषिका, हर्षणं, भवति दुःखरूपं च पश्यति पांशुपूर्णमिवाविलं नासाध्मानं, शिरोदुःखं च जायते ( सुउ. ६.१६–१७ )
कृष्णमण्डलं नतं शुक्लमण्डलमुन्नतम् ( असंउ. १८ )
रक्तजाधिमन्थलक्षणम्–बन्धुजीवप्रतीकाशं, स्पर्शनाक्षमं, ताम्यति, रक्तास्रावः, निस्तोदो भवति, अग्निनिभा दिशः पश्यति, कृष्णभागो रक्तमग्नोऽरिष्टवच्च लक्ष्यते, दीप्तरक्तपर्यन्तमक्षि इति ( सुउ. ६.१८–१९ )
डोळे आल्यावर काही योग्य उपचार न केल्यास तीव्र स्वरूपात्मक अधिमंथ हा रोग होतो.
ऊर्ध्वजत्रुगत अवयवांची जणु घुसळण होते म्हणून याला अधिमंथ म्हणतात.

**सामान्य लक्षण**–डोळा जणु उपटला जात आहेसे वाटते व खूपच घुसळल्या सारखे डोळ्यात व अर्ध्या डोक्यात वाटते. त्या त्या दोषांनी होणाऱ्या डोळे येण्याच्या विकारापेक्षा अधिमंथ रोगात वेदना फार असतात. कानशील, दात व कपाळात अत्यंत पीडा होते. वातज, पित्तज, कफज, व रक्तज असे अधिमंथाचे ४ प्रकार आहेत.

**वातज अधिमंथ लक्षण**–डोळा उपटल्या सारखा वाटणे, घुसळला वा घासला जात आहेसे वाटणे, आणि अर्ध्या डोक्यात टोचणी, फुटल्या सारखी पीडा, डोळ्याच्या मांसात खळबळ, ते गढूळ होणे व आकुंचित होणे, फुटणे, फुगणे, कंप, व तीव्र व्यथा इ. लक्षणे होऊन कानात आवाज, भोवळ, कपाळ, डोळा आणि भुवई इ० मध्ये घुसळल्यासारखे वाटते.

**पित्तज अधिमंथ लक्षण**–डोळ्यात लाल रेषा उमटणे, स्राव होणे, विस्तवाने जळत आहेसे वाटते, दाह होतो, यकृताच्या रंगाप्रमाणे किंवा जखमेवर क्षार लावल्यावर दिसावा तसे दिसते, डोळ्याच्या कडांचे शेवट पिकलेले, व सूजयुक्त होऊन घाम येतो, सर्व पिवळे दिसते, मूर्च्छा आणि डोक्यात दाह होतो.

**कफज अधिमंथ लक्षण**–यात क्षोभ फार नसतो, स्राव, खाज, शैत्य, जडत्व, बुळबुळीतपणा, डोळ्यातून घाण येते, डोळा फडफडतो, पाहाण्याची क्रिया कष्टाने घडते, धुळीचे कण गेल्यासारखा व डोळा गढूळ वाटतो, नाक फुगते, डोके दुखते, काळे मंडल दबल्यासारखे आणि पांढरे मंडळ वर उचलून आल्यासारखे होते.

**रक्तज अधिमंथ लक्षण**–बंधुजीव–दुपारीच्या फुलासारखा डोळ्याचा लाल रंग होतो, स्पर्श सहन होत नाही, डोळ्यात खुपणे, रक्तस्राव, टोचणी, सगळ्या

दिशा पेटल्या सारखे दिसते, काळ बुबुळ रक्तात बुडालेल्या रिठ्याप्रमाणे दिसते, डोळ्याचे शेवटचे भाग पेटल्या सारखे लाल दिसतात.

**अधिमांस**–न., **रोग०, अधिरूढं मांसम्, बहिर्मार्गे त्वङ्मांसस्थितो मांसप्रदोषजोऽयं रोगः** ( चसू. ११.४९ ) ( सुसू. २४.९ )
मांसावर मांस वाढणे. त्वचा व मांस यात बाह्यभागी मांस धातूच्या दुष्टीमुळे हा रोग होतो.
पु., **दन्तमूलगतरोगः, अधिमांसकपर्यायः** ( सुनि., १६.१३ ) ( **विशेषार्थेऽधिमांसको द्र०** )
दातांच्या मुळाशी होणारा रोग ( अधिमांसक–पहा )
**–विकार**–पु., **अधिमांसविशेषः, अर्शोरोगः** ( चचि. १४.५ )
**शिश्नापत्यपथगलतालुमुखनासिकाकर्णाक्षिवर्त्मत्वचादिगतानामधिमांसानां 'अर्शांसि' इति संज्ञा तन्त्रान्तरे ।** ( चचि. ५.६ )
जननेंद्रिय, योनि, गुद, गळा, टाळु, तोंड, दाताचे मूळ, नाक, कान, डोळ्याची पापणी, कातडी यांवर मांसांकुर वाढतात, त्यांना शास्त्रात अर्श म्हणतात.

**अधिमांसक**–पु., दन्तमूलगतरोगः ( अहृउ. २१.२७ ) ( सुनि. १६.२६ )
**कफदोषेण हानव्ये पश्चिमदन्तमूलमांसे उत्पन्नोऽयं व्याधिर्महाशोथयुक्तो महारुजो लालास्रावी कीलवद्धनुकर्णरुजाकरो भवति, भोजनं च प्रतिहन्ति । छेद्योऽयं रोगः** ( सुचि. २२.२४ ) ( सुसू. २५.५ )
कफ दोषामुळे हनुवटीच्या आंत दाढांच्या मुळाशी मांसात अत्यंत सूज, पीडा, लाळ स्रवणे, व खिळा ठोकल्या प्रमाणे हनुवटी व कानात पीडा करणारा रोग. यात जेवण जात नाही; हा रोग शस्त्राने छेदन करण्यासारखा आहे.

**अधिमांसार्मन्**–न., **नेत्रशुक्लगतरोग०**, ( सुउ. ४.६ ) **शुष्कासृक्पिण्डवच्छ्यावं बहलं पृथु यन्मांसं सिते नेत्रभागे जायते तत्** ( असंउ. १३ )
डोळ्याच्या पांढऱ्या भागावर सुकट रक्ताच्या गुठळीसारखे काळसर घट्ट पसरट असे मांस वाढते ते (वडस).

**अधिष्ठान**–न., **स्थानम्** ( चशा. ७.७ ) **आश्रयः** ( सुसू. १.२२ ) **दूष्यम्** ( चचि. १४.६ )
स्थान, आश्रयस्थान. दोष ज्यांना दूषित करतात ते धातु, उपधातु, मल, अवयव इ.ना दूष्य म्हणतात.

**अधृति**–स्त्री., **असंतोषः** ( सुउ. ४५.९ )
असंतोष, धैर्य नसणे.

**अधृष्य**–वि., **आक्रमितुमशक्यम्** ( काधूपकल्प., )
आक्रमण करण्यास अशक्य. ज्याच्या वर आक्रमण करणे अशक्य तो.

**अधौत**–वि., **अशुद्धम्, अक्रियमाणशौचम्** ( सुनि. १३.५७ ) न धुतलेले.

**अध्यण्डा**–स्त्री., **वनस्पति०, शूकशिम्बी, कपिकच्छुः, सौरपाका** ( चचि. ३.२६७ )
खाजकुहिली, कवच बीज, मेढशिंगी, भुईआवळी.

**अध्यमृता**–स्त्री., **वनस्पति०, त्रिवृच्छ्यामा** ( रा. ६.३६९ ) काळे तेड.

**अध्यर्ध**–वि., **अधिकार्धम्** ( सुचि. ९.१८ ) दीड.
**–धार**–न., **शस्त्र०, तद् ह्रस्ववक्त्रं छेदने भेदने च योज्यम्** ( अहृसू. २६.७ ) एक शस्त्र. लहान तोंडाचें; तोडण्यास व फोडण्यास उपयुक्त.
**–मास**–पु., **पक्षत्रयम्, सार्धमासः** ( सुशा. १०.१६ ) दीड महिना.

**अध्यर्बुद**–न., **रोग०, अर्बुदभेदः, अर्बुदोपरिजातमर्बुदम्** ( सुनि. ११.२० ) अर्बुद या रोगाचा एक प्रकार. एका अर्बुदावर दुसरे अर्बुद झालेले .

**अध्यवसान**–न., **निश्चयः** ( चवि. ४.५ ) निश्चय.

**अध्यवसाय**–पु., **बुद्धेर्व्यापारः** ( सुशा. १.१७ )
बुद्धीचे व्यापार, प्रयत्न.

**अध्यशन**–न., **अशनप्रकार० पूर्वभक्तेऽपरिणते भोजनम्** ( काखि. ६.५९ चचि. १५.२३६ )
पूर्वीचे खाल्लेले पचले नसता जेवण.
**अजीर्णे भोजनम्** ( सुसू. ४६.५०९ )
अजीर्ण झाले असता जेवण.
**ग्रहणीदूषणानामग्र्यम्** ( चसू. २५.४० )
अध्यशन हे ग्रहणी या अवयवाची दुष्टिकरणाऱ्या सर्व कारणांत श्रेष्ठ कारण होय.

**अध्यस्थि**–न., **रोग०, अस्थनि यदधिकमस्थि तत्, अस्थिवृद्धिदोषेण जायमानो रोगः** ( चसू. २८.१६ ) (सुसू. २४.९ ) हाडावर हाड वाढणे. अस्थिधातूच्या वृद्धीमुळे होणारा रोग.

**अध्यात्म**–वि., **आत्मानमधिकृत्य प्रवर्तमानम्** ( चसू. ८.१३ )
**आत्मन्यधि अध्यात्मम्, आत्मशब्दोऽत्र स्वशरीरवचनः** ( सुशा. १.७ )
आत्म्याचा विचार करण्याला प्रवृत्त झालेला, येथे आत्मा हा शब्द स्वशरीरवाचक होय.
**तत्त्वम्**–न., ( चसू. २५.२८ ) तत्व.

**अध्यात्माधिभूताधिदैवतवर्णनम्**–हा अध्यात्म अधिभूत व अधिदैवताचा तक्ता.

| अध्यात्मम् | अतधिभूम् | अधिदैवतम् । |
|---|---|---|
| १ ) बुद्धिः | बोद्धव्यम् | ब्रह्मा |
| २ ) अहंकारः | अहंकर्तव्यम् | ईश्वरः, रुद्रः |
| ३ ) मनः | मन्तव्यम् | चन्द्रमाः |
| ४ ) श्रोत्रम् | श्रोतव्यम् | दिशः |
| ५ ) त्वचा ( त्वक् ) | स्पर्शनीयम् | वायुः |
| ६ ) चक्षुः | दृश्यम् | सूर्यः |
| ७ ) रसनम् | रसनीयम् | आपः, वरुणः |
| ८ ) घ्राणम् | घ्रातव्यम् | पृथिवी, भूमिः. |
| ९ ) वाचा ( वाक् ) | वक्तव्यम् | अग्निः |
| १० ) हस्तौ | आदातव्यम् | इन्द्रः |
| ११ ) पादौ | गन्तव्यम् | विष्णुः |
| १२ ) पायुः | विसर्जनीयम् | मित्रः |
| १३ ) उपस्थम् | आनन्दनीयम् | प्रजापतिः । |

**–लोक**–पु., **सर्वप्राणिजनः** ( चसू. २६.४४ )
सर्व प्राणिवर्ग.
**चेतनलोकः** ( चचि. २६.२९२ )
सचेतन द्रव्ये, प्राणी, वनस्पती इत्यादी.

**अध्याय**–पु., **प्रकरणम्, अधिकृत्यार्थमध्यायनामसंज्ञा प्रतिष्ठिता** ( चसू. ३०.७० )
प्रकरण, अध्याय, एक विषय घेऊन त्यावर विवेचन असलेला ग्रंथाचा विभाग.

**अध्रुष**–पु., **तालुगतरोग०, तालुदेशे लोहितः स्तब्धः रुग्ज्वराढ्यः शोफः** ( सुनि. १६.४२ )
टाळूला होणारा रोग. वेदना व ज्वरयुक्त लाल रंगाची सूज.

**अध्वन्**–पु., **मार्गः, मार्गाक्रमणम्, प्रभूतं पर्यटनम्** ( सुउ. ५८.२२ )
रस्ता; रस्ता चालणे; पुष्कळ प्रवास करणे.
**दीर्घमार्गाटनम्** ( सुउ. ४१.१६ )
लांब प्रवास करणे.

**( अध्व– ) कर्शित**–वि., **अध्वगमनेन कर्शितः** ( चसू. १३.४७ ) खूप चालण्याने कृश झालेला, रोडावलेला.

**–गमन**–न., **पादाभ्यां प्रदीर्घमार्गगमनम्** (सुनि. ८.३)
खूप लांब चालणे.

**–प्रशोष**–पु.,**रोग०, शोषभेदः, अध्वा दीर्घमार्गाटनं, तेन जातो धातुक्षयः** ( सुउ. ४१.२१ )
एक सारखे खूप चालण्याने झालेला धातुक्षय; शोषाचा-क्षयाचा एक प्रकार.
**तेन स्रस्ताङ्गता संसृष्टपरुषच्छविः प्रसुप्तगात्रावयवत्वं शुष्कक्लोमगलाननत्वं भवति ।** ( सुउ. ४१.२१ )
त्याने अंग गळणे, अवयव सुन्न होणे, रूप रूक्ष व गळा, तोंड आणि क्लोम सुकणे ही चिन्हे होतात.

**–हत**–वि., **अध्वना हतः, श्रान्तः** ( चसि. २.८ )
चालण्याने थकलेला.

**अध्वर**–पु., **यागः** ( सुचि. २९.१० ) यज्ञ, याग.

**अनक्ष**–वि., **इंद्रियरहितम्** ( सुशा. ३.१८ )
डोळा इत्यादि इंद्रिये नसलेला.

**अनङ्ग**–पु., **कामः.** मदन.
**न, मैथुनायोग्यमङ्गम्.** संभोगास अयोग्य अंग.
**अङ्ग–जघनं, नाङ्गं-अनङ्गमङ्गसदृशं जघनकार्यनिर्वर्तनयोग्यं मुखादिकमुच्यते । केचिन्मुखेन तत् कुर्वन्ति, तन्निषिध्यते ।** ( अहसू. ७.७१ अरुण )
मैथुनास अयोग्य अवयव, वास्तविक गुह्य अवयव नसतां त्याचा गुह्य अवयवासारखा उपयोग करणे,

उ० मुख. काही लोक मुखाचा उपयोग गुह्य अवयवासारखा मैथुनासाठी करतात, त्याचा निषेध केला आहे.

**अनङ्गदीपन**–वि., **कामोत्तेजकम्** ( सुसू. ६.२६ ) विषयवासना वाढविणारें.

**अनध्यक्ष**–वि., **यस्याः पालनकर्ता समीपस्थो नास्ति सा स्त्री** ( चवि. ८.१३ ) पालक जवळ नसलेली स्त्री.

**अननुयोग**–पु., **अनुयोगाभावः, 'अनुयोज्यस्याननुयोगः' इति निग्रहस्थानविशेषः, इदं गौतमनये पर्यनुयोज्योपेक्षणं नाम निग्रहस्थानम्** ( चवि. ८.६५ ) हे वाद पराजयाचे लक्षण. अनुयोगाच्या विपरीत. पहा–अनुयोग.

**अननुयोज्य**–न., **वादे निग्रहस्थानविशेषः अनुयोज्यस्य विपर्ययः** ( चवि. ८.५१ )
पहा 'अनुयोज्य' अनुयोज्याचा विपर्यय.

**अनन्त**–वि., **अविनाशी** (सुशा. १.९) अंत–नाश नसलेला.
पु., **वनस्पति०, धन्वयासः** ( ध. १.२२ पृ. ११ ) धमासा.
**दिव्यसर्प०,** ( असंउ. ४१ पृ. ३३० ) दिव्य साप.
न., **खनिज० अभ्रकम्** ( रा. १३,२ ) अभ्रक.
**खनिज०, सुवर्णम्** ( सुशा. १०.१३ ) सोने.
**–चूर्ण**–न., **सुवर्णचूर्णम्** ( सुशा. १०.१३ ) सोन्याचा अत्यंत बारीक चुरा.
**–वात**–पु., **शिरोरोग०, त्रिदोषात्मको रोगः अस्मिन्मन्याघाटयोरतितीव्रा रुजः अक्षिभ्रुवशङ्खदेशेषु दोषाणामवस्थितिः गण्डपार्श्वेषु कम्पः हनुग्रहः, नयनामयाश्च भवन्ति** ( चसि. ९.८६ ) ( सुउ. २५.१३,१४ )
अनंतवात; हा त्रिदोषात्मक शिरोरोग आहे. यात मान व घसा या ठिकाणी तीव्र वेदना, डोळे, भुवया व कानशील या ठिकाणी दोषांचा बिघाड, गाल व फासळ्यामध्ये कंप, हनुवटी जखडणे व डोळ्याचे रोग होतात.

**अनन्ता**–स्त्री., **वनस्पति०, उत्पलसारिवा, दुग्धगर्भावल्ली** ( सुचि. ३.६१ ) अनंतमूळ वेल.
**दूर्वा** ( सुशा. १०.६० ) दूर्वा, हरळी.
**अनन्तमूलम्** ( चसू. ४.१५ ) अनंतमूळ.
**धन्वयासः** ( सुउ. ३९.२०८ ) धमासा.
**तृण०, श्वेतदूर्वा** ( ध. ४.१४४ ) पांढरी दूर्वा.
**अग्निमन्थः** ( रा. ९.१३६ ) अरणी.
**नागवल्ली** ( ध. ३.१ ) विड्याच्या पानाची वेल.



**अनन्न**–न., **निरन्नम्, औषधसेवनकालः** ( अहसू. १३.३७ )
**अनन्नं नाम केवलमौषधं ह्यस्तनेऽन्ने जीर्णे प्रातः उपयुज्यते, तस्मिंश्च जीर्णे पुनराहारः। निरन्नोपयोगात्तदतिवीर्यं भवति। तस्माद् बलवत्सु रोगिषु कफोद्रेके च तत् प्रशस्तम्। बालवृद्धवनितासुकुमारेषु तद्ग्लानिकरं भवति।** ( सुउ.६४.६७ असंसू. २३ ) **अभक्तम् इति पर्यायः।**
पोटात अन्न नसताना औषध घेण्याचा एक काळ. पूर्व दिवसाचे अन्न पचल्यावर सकाळी केवळ औषध घेणे व ते जिरल्यावर पुन्हा आहार घेणे या काळाला अनन्न काल म्हणतात. अन्न न घेता औषध घेतल्यास ते तीक्ष्ण वीर्य होते म्हणून बलवान रोग्यांना कफाधिक्य असता ते देणे योग्य असते. बाल, वृद्ध, स्त्रिया व सुकुमारांना ते ग्लानी आणते. 'अभक्त' हा त्याचा पर्याय शब्द.

**अनन्नाभिलाष**–पु., **रोगलक्षण० अनन्नाभिनन्दनम्** ( चनि. १.३३ ) अन्नाची इच्छा नसणे.
**कफजविकार०, मधुररसातियोगोद्भवो विकारः।** ( चसू. २६.४३ ( १ )
गोड रसाच्या अतियोगाने होणारा कफज रोग.

**अनपत्य**–वि., **क्षीणशुक्रः** ( र. १२.७ )
शुक्रक्षीण, अपत्य नसलेला.

**अनपर**–वि., **अनन्यः, अपरशब्दः परवाचकः, '( प्रकृतिपुरुषौ ) 'उभावपि नित्यौ उभावप्यनपरौ' न विद्यतेऽपरो याभ्यां तावनपरौ यतस्तावेव प्रकृतिपुरुषौ महदादिभ्यः परौ।** ( सुशा. १.९ )
एक. प्रकृति आणि पुरुष दोघे ही नित्य व दोघेही परस्पर सारखे. दोघांहून अन्य श्रेष्ठ नाही त्याअर्थी प्रकृति–पुरुषच श्रेष्ठ आहेत.

**अनपवादप्रति ( ती ) कार**–वि., **योऽपवादस्य नाम निन्दायाः प्रतिकारं न करोति** ( चवि. ८.१३ )
निन्देचा प्रतिकार न करणारा.

**अनभिषङ्ग**–पु., **फलनिरपेक्षया बुद्ध्या श्रेयःकर्मकरणम्, सात्त्विकगुणविशेषः** ( सुशा. १.१८ )
फलाची अपेक्षा न करतां कर्म करणारा, सात्विक गुणाचा विशेष.

**अनभिष्यन्दि**–वि., **व्याधीनामनुत्पादकम्, सद्यो व्याधिकरणीयामवस्थां स्यन्दयत्यापादयति यद् द्रव्यं तदभिष्यन्दि, स्रोतसामुपलेपकारि वा, तद् विपरीतमनभिष्यन्दि** ( सुचि. ३२.२९ ( ड. )

रोग उत्पन्न न करणारे द्रव्य. रोग त्वरित होण्याची अवस्था करणारे, स्रोतसांना लपेटून–माखून स्रोतोरोध करणारे द्रव्य ते अभिष्यंदी. त्याच्या विपरीत ते अनभिष्यन्दी.

**दोषान् व्याधीन् झटिति यदभिष्यन्दते उत्पादयति तदभिष्यन्दि, विपर्ययेणानभिष्यन्दि ।**
( सुसू. ४५.२५ ( ड. )

दोष किंवा रोग त्वरित उत्पन्न करते तें द्रव्य अभिष्यन्दी, या उलट कार्य करणारे अनभिष्यन्दी.

**अनर्थ**–वि., **अर्थरहितम्** ( चशा. ३.१५ )
निरर्थक, अर्थहीन, अर्थ नसलेले.

**अनर्थक**–न., **वाक्यदोष० अर्थहीनमक्षरग्राममात्रम्** ( चवि. ८.५४ )
अर्थहीन वाक्य. ज्यात केवळ पुष्कळ अक्षरे आहेत असे.

**अनर्थान्तर**–न., **एकार्थः, समानार्थः** ( चवि. ६.४ )
भिन्न अर्थ नसलेले. अभिन्नार्थी, एका अर्थाचे समान अर्थाचे पर्यायशब्द.

**अनल**–पु., **तेजः, अग्निः** ( सुशा. १.४ ) विस्तव
**खनिज०, स्वर्णम्** ( र. ८.१७ ) सोने
**वनस्पति० चित्रकः** ( ध. २.८१ ) चित्रक
**वनस्पति०, भल्लातकः** ( रा. ११.२० ) बिब्बा.

–**दल**–न., **रसभस्मना बद्धरसेनान्येन वा लोहेन किमपि मृतं लोहं पीतवर्णं प्रजायते तत्, स्वर्णदलमित्यपरपर्यायः** ( र. ८.१७ )
पाऱ्याच्या भस्माने, बद्धपाऱ्याने किंवा एखाद्या धातूने मारलेला धातु जेव्हा पिवळा होतो तेव्हा त्याला अनलदल किंवा स्वर्णदल म्हणतात.

–**प्रभा**–स्त्री., **वनस्पति०, ज्योतिष्मती.** ( रा. ३.३९५ ) मालकांगोणी.

–**भ्रंश**–पु., **रोगलक्षण० अग्निमान्द्यम्** ( र. १२.१२७ ) अग्निमांद्य.

–**साद**–पु., **लक्षण०, अग्निमान्द्यम्** ( सुसू. ४६.२४५ ) अग्निमांद्य.

**अनलङ्कारिक**–वि., **शरीरविभूषणार्थे यन्न प्रयुज्यते** ( चवि. ७.७ )
भूषणाकरितां ज्याचा उपयोग केला जात नाही ते.

**अनवद्य**–वि., **अगर्ह्यः, निर्दोषः** ( अहउ. ४०.४१ )
अनिंद्य, निर्मल, दोषरहित.

**अनवपतितशब्द**–वि., **अग्राम्यशब्दम्** ( चवि., ८.३ )
सभ्यशब्द, शिष्टशब्द.

**अनवबद्ध**–वि., **त्वङ्मांसादिधातुषु अनासक्तम्, शल्यप्रकारः** ( सुसू. २७.३ )
त्वचा, मांस इत्यादी धातूंमध्ये पक्के रुतून न बसलेले एक प्रकारचे शल्य.

**अनवस्थान**–न., **रोगलक्षण० चाञ्चल्यम्, अस्थिरत्वम् चलचित्तत्वम्** ( चनि. १.२१ )
चंचलपणा, अस्थिरपणा, मनाचा अनिश्चितपणा.

**अनवस्थायी**–वि., **चञ्चलचित्तः, अस्थिरमतिः** ( सुशा. ४.९० )
चंचल मनाचा, अस्थिर विचाराचा.

**अनवस्थित**–वि., **स्थानान्तरप्राप्तम्** ( सुउ. ३९.१०३ )
एके ठिकाणाहून दुसरीकडे गेलेला; चंचल.

–**चित्तत्व**–न., **चित्तस्यानवस्थितिः** ( चसू. २०.११ )
मनाची अनिश्चितता, मनाची अस्थिरता.

–**सत्त्व**–वि., **चञ्चलचित्तः** ( असंसू. ८.१९ )
चंचल मनाचा. अस्थिर मनाचा.

**अनवस्थितात्मन्**–वि., **चञ्चलचित्तः** ( सुशा. ४.६५ )
अव्यवस्थित विचाराचा, अस्थिर विचारांचा, चंचल मनाचा.

**अनवहितत्व**–न., **अन्यमनस्कत्वम्, अवधानरहितत्वम्** ( चवि. ८.१८ )
चालू विषयात मन नसणे, लक्ष दुसरीकडे असणे, लक्ष न देणे.

**अनवाप्ति**–स्त्री., **अनुपलब्धिः** ( सुचि. ३४.४ )
इच्छिलेले न मिळणे, इष्टाची अप्राप्ति, पाहिजे ते न मिळणे.

**अनशन**–न., **लङ्घनम्** ( चनि., १.२८ )
**'आयुषो ह्रासकराणां श्रेष्ठम्'** ( चसू. २५.४० )
उपोषण, उपास. निरोगी मनुष्याने उपास करणे हे आयुष्याचा नाश करणाऱ्या उपायात श्रेष्ठ आहे.
**अल्पभोजनम् तद्वातप्रकोपकारणम्** (सुसू. २१.१९)
थोडे खाणे, थोडे जेवणे, हे वाताचा प्रकोप करणारे आहे.

**अनस्थि**–वि., **अल्पकोमलास्थि** ( सुशा. २.४७ )
थोडी कोमल हाडे असलेला ( गर्भ ).
**बीजरहितं ( फलादि )** ( चचि. १.५८ )
बी ( आठळी ) नसलेली फळे इत्यादी.

**अनहङ्कृत**– वि., **अहंकारहीनः, अनुद्धतः** ( चवि. ८.८ )
गर्वरहित, ताठा नसणारा, उद्धट नसलेला.

**अनागत**–वि., **ईषदागतः** ( सुचि. २४.१ )
थोडा–किंचित् ( अल्प प्रमाणात ) आलेला.

**भविष्यत्** ( चशा. १.९१ )
पुढे होणारे, पुढच्या काळात होणारे,
**भविष्यकालः** ( रा. परि० २१.१८ )
भावीकाल, भविष्य काळ.

**-विज्ञान**–न., **ग्रहलक्षण०, भविष्यद्विज्ञानम्** ( सुउ. ६०.४ )
भविष्याचे ज्ञान, पुढे काय होणार त्याचे ज्ञान.

**अनागताबाधाप्रतिषेधनीय**–पु., **अध्याय०,** ( सुचि. २४.१ )
पुढे होऊ शकणाऱ्या रोगांचे प्रतिबंधक उपचार ज्यात सांगितले आहेत असा अध्याय.

**अनागतावी**–वि., **अप्राप्तप्रसववेदना** ( चशा. ८.४० )
प्रसूतीच्या वेणा न आलेली.

**अनागतावेक्षण**–न., **तन्त्रयुक्ति०, यदनागतं विधिं प्रमाणीकृत्यार्थसाधनम्** ( चसि. १२.४४ )
पुढे येणाऱ्या विधानाचा निर्देश करून अर्थ स्पष्ट करणे.
**अनागतस्य भविष्यतोऽवेक्षणमवलोकनं कार्यार्थम्** ( सुउ. ६५.३० )
पुढील अमक्या प्रकरणात हा विषय येईल असे विधान.

**अनातपशुष्क**–वि., **आतपे यन्न शुष्कम्; छायाशुष्कम्** ( चचि. १.५८ )
उन्हात न सुकविलेले, छायेत सुकविलेले.

**अनातुर**–वि., **स्वस्थः, रोगरहितः** ( चइ. ८.८ )
निरोगी, अरोगी, स्वस्थ.

**अनात्मवत्**–वि., **अजितेन्द्रियः, अपथ्यसेवी** ( सुचि. ३.३ )
**आत्मा, प्रयत्नः इति पर्यायौ, स्वास्थ्यानुवृत्त्यनुकूल-प्रयत्नशून्यः** ( हाराणचंद्र सुनि. २.४ )
**मूढबुद्धिः** ( सुचि. ३०.४ )
मनोनिग्रह नसलेला.
मनावर ताबा नसलेला, अपथ्य सेवन करणारा, आरोग्याला पोषक प्रयत्न न करणारा. मूर्ख. आत्मा व प्रयत्न हे पर्याय आहेत.

**अनादरोपक्रान्त**–वि., **असम्यगुपक्रान्तः** ( चचि. २१.४२ )
योग्य चिकित्सा झाली नाही असा.

**अनादिः**–वि., **न विद्यते आदिः कारणं ( उत्पत्तिः ) यस्य, उत्पत्तिरहितः** ( सुशा. १.९ )
आरंभ नसलेला, जन्म नसलेला, ज्याला कारण-उत्पत्ति नाहीं असा.

**अनादिनिधन**–वि., **जन्ममृत्युरहितम्; आद्यन्तरहितम्** ( असंसू. ४.३ )
जन्ममृत्युरहित, आरंभ व शेवट नसलेला, नित्य.

**अनादिमध्यनिधन**–वि., **आदिरुत्पत्तिः आद्यन्तयोरन्तरा मध्यं, निधनं विनाशः एतैर्वर्जितः ( कालादिः )** ( सुसू. ६.३ ) नित्य. ( काल इ० )
आरंभ, मध्य व शेवट नसलेला.

**अनानुपूर्व्य**–न., **यथोक्तक्रमत्यागः यथा–उष्णं निषेव्य सहसा शीतसेवा, तद्विपर्ययश्च; अनुचिते काले शीतोष्णसेवा च ।** ( चनि. ५.६ )
शास्त्रोक्त क्रम न पाळणे, तो टाळणे. उष्ण द्रव्याचा उपयोग केल्यावर लगेच थंड द्रव्याचा उपयोग करणे किंवा या उलट क्रमाने एकदम उपयोग करणे, क्रम न ठेवता विपरीत गुणी द्रव्यांचा उपयोग करणे. अनुचित काळी थंड उष्ण सेवन करणे.

**अनाप्यायमान**–वि., **अतृप्यन्, न वर्धमानः** ( चनि. ६.१० )
न वाढणारे, पुष्ट न होणारे, तृप्ति न होणारे.

**अनामक**–पु., **बालरोग०, मातृकादोषः, गुदकुट्टः** ( असंउ. २ )
या नावांचा मुलांना होणारा रोग.

**अनामन्**–पु., **बालरोग०, गुदकुट्टः** ( असंउ. २ )
'अनामक' पहा.

**अनामय**–न., **रोगाभावः, आरोग्यम्,**
रोग नसणे. रोगशून्य.

**अनामा**–स्त्री., **अनामिका** ( र. ७.२९ )
करंगळी जवळचे बोट.

**अनामिका**–स्त्री., **शारीर०, अङ्गुष्ठाच्चतुर्थाङ्गुलिः,** ( सुसू. ३५.१२ ) आंगठ्यापासून चवथे बोट.

**अनामी**–स्त्री., **अनामिका** ( अहसू. २५.३८ )
पहा 'अनामा'.

**अनायत्तत्त्व**–न., **अनधीनत्वम्** ( सुचि. ३०.४ )
स्वाधीन नसणे, आधीन नसणे.

**अनायास**–पु., **यक्षनाम०, येन नष्टं काश्यपतन्त्रं कलियुगे धारितम्** ( काकल्प. २४ )
यक्षाचे नांव. ज्याने नष्ट झालेले काश्यपतंत्र कलि-युगांत पुन्हा तयार केले.

**अनायुष्य**–वि., **आयुषो ह्रासकरम्** ( चचि [illegible]
आयुष्यनाशक. आयुष्याला अहित

**अनार्तव**–वि., **अयोग्यर्तुभूत्पन्न** ( चसू. २७.३१६ ) (
योग्य ऋतूमध्ये उत्पन्न

**अनार्तवस्तना**–वि., **अरजस्का, अल्पस्तनी च** ( सुउ. ३८.१८ )
विटाळ न आलेली व लहान स्तन असलेली स्त्री.

**अनार्य**–वि., **आराद् दूरात् पापेभ्यो यातः इति आर्यः, तद्विपरीतोऽनार्यः** ( चक्र. चसू. ८.१९ )
जो पापापासून दूर तो आर्य; त्याच्या विपरीत तो अनार्य.

**अनार्यक**–न., **वनस्पति०, काष्ठागरु, अगरु** ( ध. ३.२५ ) ( रा. १२.४२ ) अगरू.

**अनार्यतिक्त**–पु., **वनस्पति०, किराततिक्तः** ( ध. १.३३ ) काडेचिराईत.

**अनाविल**–वि., **प्रसन्नम्** ( सुचि. १२.२० )
गढूळ नसलेले. स्वच्छ.

**–दर्शन**–न., वि., **अकलुषिता दृष्टिः, निर्मलदृष्टियुक्तम्** ( सुउ. १९.७ ) निर्मळ– स्वच्छ दिसणारे. निर्मल दृष्टि युक्त, निर्मल दृष्टी.

**अनास्थाप्य**–वि., **आस्थापनबस्तावयोग्यः** ( चसि. २.१४ ) निरूह–मळाची शुद्धि करणारा वस्ति देण्यास अयोग्य.

**अनिग्रह**–पु., **यन्त्र०, अनिबन्धनः संदंशयन्त्रभेदः** ( सुसू. ७.११ )
धरावयाची मूठ नसलेले यंत्र. संदंश यंत्राचा प्रकार.

**अनिज**–वि., **आगन्तुः** ( चचि. १२.४ )
आपल्या–स्वतःच्या शरीरस्थ दोषापासून न झालेला रोग. बाह्य कारणापासून झालेला रोग.

**अनित्यता**–स्त्री. **मरणम्** ( चसू. ३०.२५ ) मरण.

**अनिमित्त**–वि., **तदात्वेऽनुपलभ्यमाननिमित्ता** ( चइं. १.७ )
त्यावेळी ज्याचे कारण सांपडत - दिसत नाही असे ते

**अनिमिषाक्ष**–वि., **रोगलक्षण०, स्तब्धाक्षः** ( सुनि. १.७३ )
पापणी न मिटणारा डोळा. निश्चल डोळा.

**अनिर्देशकारित्व**–न., **रोगिदोषः, वैद्योपदिष्टानामकर्तृत्वम्, अनिर्देशकारित्वमरिष्टानां अग्र्यम्** ( चसू. २५.४० )
रोग्याचा हा एक दोष. वैद्याने सांगितलेले पथ्या–पथ्य न पाळणे. हे मरण दर्शक चिन्हात मुख्य चिन्ह आहे.

**अनिर्देश्यरस**–वि., **अव्यक्तरसम्** ( सुसू. ४५.३ )
ज्याचा रस व्यक्त होत नाही असे द्रव्य (शुद्ध पाणी.)

**अनिर्वेद**–पु., **दौर्मनस्याभावः, उत्साहः, 'अनिर्वेदो वार्तलक्षणानां श्रेष्ठम्'** ( चसू. २५.४० )
खिन्नतेचा अभाव. उमेद–उत्साह–प्रसन्नता हे आरोग्याच्या सर्व लक्षणात श्रेष्ठ आहे.

**अनिल**–पु., **देवता०, वायुः** (सुसू. २१.८) वायुदेवता. वात. **वातदोषः** ( अहसू. १.११ ) त्रिदोषांपैकी वात दोष.

**–ग्रह**–पु., **रोग० वातावरोधः अशीतिवातरोगेष्वेकः** ( कासू. २७.१९–२० )
वाताने अवयव धरणे - जखडणे. ऐशी वातरोगांपैकी एक.

**–घ्नक**–पु., **वनस्पति० बिभीतकः।** बेहडा.

**–ज्वर**–पु., **रोग० वातज्वरः** ( र. १२.२१ )
वातज्वर; वात दोषाने आलेला ताप.

**–मूढता**–स्त्री., **रोगलक्षण० वायोः सम्यगसंचारः** ( अहसू. १३.२३ )
वाताचा संचार योग्य न होणे. वात रोकला जाणे.

**–रक्त**–न., **रोग० वातरक्तसंज्ञकः; वातादिमिश्रं रक्तम्** ( असंशा. ६.२२ ) या नावाचा रोग. वातप्रधान दोषांनी दुष्ट झालेले रक्त.

**–सूदन**–वि., **वातनाशकम्** ( चचि. १७.९० )
वातनाशक. वातशामक.

**अनिलान्तक**–पु., **वनस्पति० इङ्गुदी** ( रापरि. ८.१७ )
हिंगणबेट.

**अनिलापह**–पु., **वनस्पति० कुलित्थः** ( ध. ६.१०५ )
कुळीथ; हुलगे.
वि., **वातघ्नं** ( सुचि. २२.३६ ) वातनाशक.

**अनिलायन**–न., **वायुमार्गः** ( सुनि. १६.६१ )
वाताच्या संचाराचा मार्ग.

**अनिलारि**–पु., **योग० 'वातारि' इति प्रसिद्धः** ( र. २१.५० ) या नावाचा औषधि योग.

**अनिष्टदिष्ट**–वि., **अहितकरत्वेन उक्तम्, अनिष्टकारकं दैवम्** ( असंउ. ३३ ) अहितकारक म्हणून सांगितलेले. अनिष्टकारक असे दैव.

**–पाक**–पु., **अनिष्टपूर्वकर्मभिः उत्पन्नः पाकः** ( असंउ. ३३ )
अनिष्ट अशा पूर्व कर्माचे उत्पन्न झालेले फळ, संकट, दुर्दैवाचा फेरा.

**अनुकण्ठन**–न., **स्तोकपानम्** ( असंउ. २४. )
अल्पपान. थोडे पिणे.

**अनुकरण**–न., **अनुकृतिः** ( चनि. ७.७ ( १ )
अनुकरण. नक्कल.

**अनुकर्ण**–न., कर्णसमीपदेशः ( असंशा. ७.२३ )
कानाजवळचा भाग.

**अनुकूला**–स्त्री., वनस्पति० दन्ती ( रा. ६.३३८ )
दाती.

**अनुकेसरा**–स्त्री., वनस्पति० मुस्ता ( रा. ६.६२ )
नागरमोथा.

**अनुक्रोश**–परिव० पु., दया, अनुकम्पा
( चशा.४.३८ ( १ )
दया, माया, ममता, कृपा, करुणा.

**अनुग**–वि., व्याप्तम् ( सुउ. ४७.६७ ) व्यापलेले. पसरलेले.

**अनुगत**–वि., एकीभूतम् ( सुचि. ५.२२ )
एक झालेले. एकरूप.

**अनुगामिन्**–वि., रोगानुगामी ( असंसू. २२ )
मागोमाग जाणारे. रोगाच्या पाठोपाठ होणारे (उपद्रव)

**अनुगुण**–वि., अनुकूलः ( सुनि. ३.१४ )
अनुकूल - स्वतःच्या मार्गात अप्रतिहत संचार करणारा. अनुलोम.

**अनुगुप्त**–वि., कृतरक्षं, वाताद्यननुगमनीयम्
( चवि. ७.२२ ) औषध भांड्यात घालून, झाकण घालून, कपड्याने झांकून, वारा इ० शिरूं नये म्हणून तोंड बांधून ठेवलेले.

**अनुग्रथित**–वि., विग्रथितम् ( चचि. १९.५ )
ज्या वातज अतिसारात मळाच्या लहान मोठ्या गाठी पडतात तो.

**अनुचित**–वि., अनभ्यस्तम् ( सुचि. २४.९७ )
ज्याची संवय नाही असे ( आहार्य पदार्थ. )

**अनुज**–न., वनस्पति० प्रपौण्डरीकम्
( ध. ३.९२ रा. १२.१५४ ) पांढरे कमळ.

**अनुतर्ष**–न., अनुपानम्, मुहुर्मुहुः दीयमानं पानम्
( चचि २४.१४.८ ) तहानेला अनुसरून थोड्या थोड्या वेळाने करावयाचे पान.

**अनुत्तम**–वि., अत्युत्कृष्टः ( सुनि. ३.१४ )
सर्वोत्तम. सर्वात श्रेष्ठ–उत्तम–उत्कृष्ट.

**अनुत्थित**–वि., नोन्नमिता ( असंसू. ३६.८ )
वर उचलून न आलेली, त्वचेत उठून न दिसणारी.

**अनुत्सेक**–पु.,वि., क्रोधस्य गर्वस्य च अभावः, क्रोधरहितः, अनुद्धतो वा ( चवि. ८.१३ ) क्रोधाचा, गर्वाचा अभाव. क्रोधरहित. उद्धट नसलेला, विनयशील.

**अनुदक्षिण**–अ., सव्यम् ( असंसू. ३ ) डावे.

**अनुद्वृत्त**–वि., अनुच्छलितम्, अवमितम्, कर्षणकृत-परावृत्त्या हि दंष्ट्राणामधोमुखत्वम् ( सुक. ३.२९ )
न उसळलेले, न ओकलेले, ओढल्यावर उलटल्यानंतर सापाच्या दाढेचे टोक खाली होणे.

**अनुधूप**–पु., धूपप्रकार०, धूपस्य अनु - पश्चात् दीयते यः सः ( काक धूप० )
धूप दिल्यानंतर पुन्हा द्यावयाचा धूप.

**अनुनय**–पु., सान्त्वनापूर्वकं वचनादि ( सुउ. ४६.२३ )
सांत्वनपर बोलणे, विनंति, प्रेमाचे बोलणे, मनधरणी.

**अनुन्नत**–वि., ईषदुन्नतः, तनुः ( सुनि., १०.३ )
किंचित वर आलेले, पातळ.

**अनुपक्रम**–वि., न विद्यते उपक्रमः प्रतीकारः यस्य सः, असाध्यस्यैकः प्रकारः, प्रत्याख्येय इति यावत्
( चसू. १०.९ ) ( असंसू. २ )
लक्षणानि–त्रिदोषजः क्रियापथमतिक्रान्तः, सर्वमार्गानुसारी, औत्सुक्यारतिसंमोहकरः, इन्द्रियनाशनः, सारिष्टो, दुर्बले सुसंवृद्धो व्याधिः प्रत्याख्येयो भवति । ( चसू. १०.१९–२० )
ज्या विकारात किंवा विकाराच्या अवस्थेत उपचार केल्याचा उपयोग नाही. उपचार नाही असा रोग किंवा रोगावस्था. असाध्य रोगाचा किंवा रोगावस्थेचा एक प्रकार. असाध्य लक्षणे - त्रिदोषज, चिकित्सेच्या मार्गापलीकडचा, सर्व मार्गात पोचलेला, तीव्र इच्छा, निरुत्साह, संमोह, इंद्रियनाशक उपद्रवयुक्त, दुर्बलांचा वाढलेला व्याधि असाध्य होतो.

**अनुपक्व**–वि., अपक्वो हीनपक्वो वा ( र. १८.२९ )
कच्चा किंवा कमी पिकलेला - थोडा पिकलेला.

**अनुपचारवचन**–न., अननुकूलवचनम्, प्रतिकूलवाक्यम्
( चसू. ११.३९ ) प्रतिकूल वाक्य, विरुद्ध वाक्य. अनुकूल नसलेले वाक्य.

**अनुपत्यक**–वि., यद्विदूरम् अन्यस्य महतो गृहस्य तत् ( गृहम् ) ( चसू. १५.६ )
मोठ्या घरापासून दूर नसणारे घर. मोठ्या घराजवळचे लहान घर.

**अनुपद्रव**–वि., उपद्रवरहितम् ( चचि. ३.५० )
उपद्रव नसलेले.

**अनुपशय**–पु., असात्म्यम्, दुःखकारकम्
( चसू. ११.३८ )
व्याध्यसात्म्यम् ( अहृनि. १.८ )
औषधान्नविहाराणामसुखकर उपयोगो रोगेषु, अयमुपक्रमो गूढलिङ्गव्याधीनां परीक्षायामुपशयेन साकं प्रयुज्यते ( चनि. १.१० ) ( चवि. ४.८ )
शरिराशी आत्मसात न होणारे. दुःख - वेदनाकारक.

व्याधीला सात्म्य न होणारे; व्याधी वाढविणारा. या उपायाने अव्यक्त चिन्हे असलेल्या रोगाचा निश्चय करण्यास मदत होते.

**अनुपस्कृतविद्य**–वि., **शास्त्रान्तरज्ञानेन नास्त्येवोपस्कृता विद्या यस्य सः; आयुर्वेदज्ञः सन् शास्त्रान्तरेणापि असंस्कृतः** ( चवि. ८.४ )
एका शास्त्राखेरीज अन्यशास्त्रांच्या ज्ञानाने आपल्या शास्त्राचे ज्ञान ज्याने परिपुष्ट व प्रगल्भ केले नाही असा. आयुर्वेदज्ञ असूनही दुसऱ्या शास्त्राचा संपर्क नसणारा.

**अनुपहतरेतस्**–वि., **शुद्धशुक्रः, सुप्रजाजननक्षमः** ( चशा. ३.३ ) शुद्ध शुक्र असलेला. चांगली संतति निर्माण करण्याची योग्यता असलेला.

**अनुपातिन्**–वि., **सम्बन्धि** ( चशा. १.८१ )
संबंध असलेला.

**अनुपान**–नि., **अन्नादनु पश्चात्पीयते तत्** ( सुसू. ४६.४१९ )
**गुणाः–अनुपानं तर्पयति प्रीणयति ऊर्जयति बृंहयति पर्याप्तिं अभिनिर्वर्तयति, भुक्तमवसादयति, अन्न-संघातं भिनत्ति, मार्दवमापादयति, क्लेदयति, जरयति आहारस्य सुखपरिणामितां आशुव्यवायितां चोपजनयति, आयुषे बलाय च भवति** ( चसू. २७.३२५ )
**तदादौ कर्शयेत्पीतम्, स्थापयेन्मध्यसेवितम्। पश्चात्पीतं बृंहयति तस्माद्वीक्ष्य प्रयोजयेत्।** ( सुसू. ४६.४३८ )
**'अनुपाने तु सलिलमेव श्रेष्ठम् सर्वरसयोनित्वात्सर्वभूतसात्म्यत्वात् जीवनादिगुणयोगाच्च'** ( असंसू. १०.४२ )
दोषभेदेनानुपानम्–
**'स्निग्धोष्णं मारुते पथ्यं कफे रूक्षोष्णमिष्यते।
अनुपानं हितं चापि पित्ते मधुरशीतलम्॥
हितं शोणितपित्तिभ्यः क्षीरमिक्षुरसस्तथा।
अर्कशेलुशिरीषाणामासवास्तु विषार्तिषु॥'** ( सुसू. ४६,४२९ )
**सर्वद्रव्याणामनुपानानि** ( सुसू. ४६ ) **इत्यत्र द्रष्टव्यानि**
**अनुपाने वर्ज्याः –
ऊर्ध्वजत्रुगदश्वासकासप्रसेकहिध्मास्वरभेदोरःक्षतिनः गीतभाष्यप्रसक्ताश्च** ( असंसू. १०.५५–५६ )
अन्न घेतल्यानंतर जे प्याले जाते ते अनुपान होय; त्याचे गुण–झीज भरून काढते, रुचि निर्माण करते, उत्साह वाढवते, पुष्टि करते, तृप्ति करते, अन्न खाली नेते, ओले करते, जिरवते, शारीर घटकात पर्यवसान करून घटक शरीरात लौकर पाठविते, आयुष्यबल वाढविते. तेच जेवणाच्या अगोदर प्याले तर कृशता व नंतर प्याले तर पुष्टि करते व मध्ये प्याले तर सारखेच शरीर राहाते. पाणीच अनुपान म्हणून श्रेष्ठ. ते सर्व रसांचे कारण. सर्व प्राण्यांना सात्म्य असून ह्यात जीवनादि गुण आहेत; म्हणून स्निग्ध, उष्ण, वातावर; रूक्ष उष्ण कफावर; गोड थंड पित्तावर उपयुक्त. रक्त पित्तास उसाचा रस. रुई, भोकर, शिरस यांची आसवे विषावर उपयुक्त, पण आवाज फुटणे, मानेच्या वरचे रोग, श्वास, खोकला, तोंडाला पाणी सुटणे, यावर व छातीतली जखम असलेले, गाणारे व वक्ते याना अनुपान वर्ज्य.

**अनुपाश्रित**–वि., **आसनरहितम्** ( सुचि. २४.९८ )
बैठकीशिवाय. आसन नसलेला.

**अनुपीत**–वि., **भावितम्** ( सुउ.११.११ ) भावना दिलेले.

**अनुपूर्ववृत्त**–वि., **यदनुपूर्वशः वृत्तं नाम वर्तुलं तत्** ( असंशा. ८.३२ )
पूर्वी सांगितल्या प्रमाणे वर्तुळ.

**अनुपूर्वशः**–अ., **पूर्वसदृशः; अनुशब्दः सदृशार्थोऽत्र** ( सुचि. २.३४ ) पूर्वी सांगितल्या सारखे.

**अनुप्रणिधान**–न., **प्रयत्नः, कर्तव्यम्** ( चवि. ६.१४ )
प्रयत्न, कर्तव्य. योग्य उपयोग.

**अनुप्रविष्ट**–वि., **अनन्तरप्रविष्टम्, यथा पृथिव्यादिभूतस्य उत्पत्त्यनन्तरमन्यस्य जलादेस्तत्र प्रवेशः तद्विशिष्टमनुप्रविष्टम्** ( सुशा. १.२१ )
नंतर प्रविष्ट झालेले. पृथ्वी इत्यादि भूते निर्माण झाल्यावर नंतर जलादि भूतांचा त्यात प्रवेश झाला; ते अनुप्रविष्ट.

**अनुप्राप्त**–वि., **आश्रितः** ( सुनि. ८.३ )
स्थानात झालेला. अपत्यपथात प्रसवमार्गात आलेला.

**अनुबद्धशूल**–वि., **रोगलक्षण० पश्चात्सातत्येन शूलयुतम्** ( चचि. १९.७ )
मागाहून सतत शूलयुक्त. ( कफातिसार )

**अनुबन्ध**–पु., **सम्बन्धः** ( चवि. ६.९ )
**उत्तरकालः अन्यकालो वा** ( चवि. ३.४६ )
**पुनरुद्भवः** ( सुउ. ३९.१६४ )
**पश्चाद्भाविफलम् 'अनुबन्धः खलु स यः कर्तारमव**

इयमनुबध्नाति, कार्यादुत्तरकालं कार्यनिमित्तः शुभो वाऽप्यशुभो वा भावः' ( चवि. ८.७४ )
**कार्यस्य आयतीयं ( उत्तरकालिकं ) फलम्** ( चवि. ८.३ )
**कारणम्** ( सुउ. ३९.५६ )
**आयुः अनुबन्धाति आयुरपरापरशरीरादिसंयोगरूपतया** ( चसू. १.४२ )
**परतन्त्रः—व्याधिर्दोषो वा** ( चवि. ६.११ )
नित्य संबंध. नंतरचा किंवा दुसरा काल. पुन्हां उत्पन्न होणे. मागाहून मिळणारे फळ कर्त्याला अवश्य प्राप्त होत राहते. कार्याच्या निमित्ताने ते कार्य संपल्यानंतर मिळत राहणारे शुभ किंवा अशुभ फळ. कार्यानंतर मिळणारे फळ. कारण. आयुष्य. शरीर, इंद्रिये, सत्त्व आत्मा यांचा परस्पराशी अखंड संबंध राहाणे म्हणजे आयुष्य. परतंत्र व्याधी, उपद्रव किंवा दोष.
**अनुबध्नाति अनुबध्यते इति अनुबन्धः, अनुगामित्वम्, गौणत्वेन स्थितिः** ( अहृचि. ३.७० )
पुढे असणाऱ्याशी मागाहून संबद्ध तो असणारा अनुबंध. मागाहून जाणे. गौणरूपाने अस्तित्व.

**—कोप**—वि., **दीर्घकालकुद्धम्** ( चशा. ४.३८ ( २ )
दीर्घकाळ सारखा रागावणाऱ्याचा राग. फारां दिवसांचा राग.

**अनुबन्ध्य**—पु., **स्वतन्त्रः स्पष्टाकृतिः यथास्वं समुत्थानोपशयश्च** ( असंसू. २२ )
स्वतंत्र, स्पष्ट स्वरूपाचा ( चिन्हांचा ). स्वतःला निर्माण करणाऱ्या कारणांनी उत्पन्न झालेला, व स्वतःच्या उपचारांनी शमन पावणारा.

**अनुबल**—वि., **अनुबन्धरूपः** ( चचि. ३.४४ )
दोषाला मदत करणारा दोष. मागाहून बलवान झालेला धातुदोष.

**अनुबाधन**—वि., **दीर्घकालावस्थायि विकारकारि** ( चचि. १.५ )
**कालान्तरेण प्राणहरणम्** ( असंसू. १२ )
दीर्घकाल शरिराला बाधक विकारकारी होणारे. ( कुष्ठासारखे विकार करणारे ) कालांतराने प्राणहारक.

**अनुमत**—न., **तन्त्रयुक्ति० परमतमप्रतिषिद्धमनुमतम्** ( सुउ. ६५.२८ )
यथा "**गर्भशल्यस्य जरायुप्रपातनं कर्म संशमनमित्येके**" इत्यादि एकीयमतं प्रतिपाद्य अप्रतिषेधादनुमन्यते ( चसि. १२.४३ )
ज्याचा निषेध केला नाही असे परमत संमत समजावे. जसे- गर्भशल्याचे संशमन म्हणजे जरायु ( वार ) पाडणे असे एकमत. असेच आणखी कोणतेही एकमत त्याचा निषेध न झाला तर ते संमत समजावे. मूकसंमति.

**अनुमान**—न., प्रमाण० **अनुमीयते अनेन वस्तुस्वरूपमिति** ( चसू. ११.७ )
**युक्त्यपेक्षः तर्कः** ( चवि. ८.४० )
**तर्कः; अप्रत्यक्षज्ञानम्** ( सुसू. १४.३ )
ज्याच्या योगाने एकाद्या वस्तूचे अनुमान ( तर्क ) केले जाते ते अनुमान. युक्तीच्या सहाय्याने केलेला तर्क ( अनुमान ). तर्क म्हणजे अप्रत्यक्ष ज्ञान.

**अनुमार्जन**—( परिव० ) न., **अनुमर्दनम्** ( सुचि. ३.३२)
**प्रच्युतस्य सन्ध्यस्थ्नो मार्गोपलम्भार्थम् अनुमार्जनं विधेयम् ।**
जपून मर्दन करणे. निखळलेल्या सांध्याचे हाड कसे बसविता येईल हे ठरविण्याकरितां—मार्ग समजण्याकरितां करावयाचे मर्दन.

**अनुयन्त्र**—न., **स्वल्पयन्त्रकार्यकरम्** ( अहसू. २५.३९–४० ) यंत्राचे थोडे कार्य करणारे.
**पर्यायः—उपयन्त्रम्** ( सुसू. ७.१५ ) उपयंत्र.
**अनुयन्त्राणि—अयस्कान्तरज्जुचर्मान्तर्वस्त्राश्ममुद्गरपाणिपादतलाङ्गुलिजिह्वादन्तनखमुखशाखावालचलोष्मकालपाकहर्षभयानि** ( असंसू. ३४ )
अनुयन्त्रे—लोहचुंबक, दोरी, चामडे, कपडा, दगड, लाकडाचे हात, पाय, तळहात, करंगळी, जीभ, दांत, नखे, तोंड, झाडाची फांदी, केस, वात, उष्मा, काल, पक्वावस्था, हर्ष, भय.

**अनुयव**—पु., **वनस्पति०, शूकधान्य० निःशूको यवः**
कुसळे नसलेला जव.
**तद्गुणाः यवान्न्यूनाः** ( अहसू. ६.१५ )
जवाच्या गुणासारखा पण थोडा कमी गुणाचा.

**अनुयोग**—पु., **प्रश्नः, तद्विद्यानां तद्विद्यैः सार्धं तन्त्रे तन्त्रैकदेशे वा प्रश्नः प्रश्नैकदेशो वा** ( चवि. ८.५२ )
प्रश्न. तज्ज्ञाने तज्ज्ञाला शास्त्र किंवा शास्त्रातील एकाद्या मुद्याबद्दल ज्ञानादिकाच्या परीक्षेसाठी विचारलेला प्रश्न किंवा प्रश्नाचा अंश.

**अनुयोज्य**—न., तन्त्रयुक्ति०, **अनुयोज्यं नाम यद्वाक्यं**

**वाक्यदोषयुक्तं तत्, सामान्यतो व्याहृतेष्वर्थेषु विशेषग्रहणार्थं यद् वाक्यं तदप्यनुयोज्यम्** ( चवि. ८.५० )
शास्त्रार्थ लावण्याच्या युक्तीतील एक मुद्दा. जे वाक्य वाक्यदोषांनी युक्त आहे ते. सामान्यतः सांगितलेल्या अर्थातील विशेष ग्रहणाची पृच्छा करणारे वाक्यही अनुयोज्य होय.

**अनुरस**—पु., **पश्चादुपलभ्यते यो रसः** ( चसू. २६.२३ )
प्रथम अनुभवाला आलेल्या रसानंतर जो रस व्यक्त होतो, अनुभवाला येतो तो; जिभेला कळतो तो.

**अनुलेप**—पु., **लेपनम्** ( सुउ. ११.६ ) लेप.

**अनुलेपन**—न., **उपक्रम०, स्नानाद्यनन्तरं गन्धद्रव्यैः शरीरस्य लेपः** ( चनि. १.३६ )
**गुणाः—' सौभाग्यदं वर्णकरं प्रीत्योजोबलवर्धनम् । स्वेददौर्गन्ध्यवैवर्ण्यश्रमघ्नमनुलेपनम् ॥ '** ( सुचि. २४.६३ )
**अनुलेपने अयोग्या :— येषां स्नानं निषिद्धं तेषामनुलेपनमपि निषिद्धम्।** ( सुचि. २४.६४ )
स्नानादि नंतर सुगंधी द्रव्यांचा अंगाला लेप करणे. गुण—सौभाग्यदायक, वर्ण सुधारणारा, प्रीति, ओज, बलवर्धक, घाम, दुर्गंध, वाईट वर्ण, थकवा नाशक आहे. स्नान ज्यांना निषिद्ध त्यांना लेप सुद्धा निषिद्ध.
**—परिक्लेशन**—न.,**रोगलक्षण०, गन्धचन्दनादिलेपने क्लेशः** ( चनि. १.३३ )
अगरूचंदनादिकांचा लेप केल्यानंतर होणारा त्रास—क्लेश.

**अनुलोम**—वि., **अधोमार्गगामि, विरेचनमिति यावत्** ( चसि, ६.३ )
अधोगामी रेचक इत्यादि.
**लोमानुकूलम्— येनैवावर्तेन लोमानि सन्ति तेनैवावर्तेन शस्त्रावचारणम्** ( सुसू. ५.७ )
केश—रोम याची जी दिशा त्या दिशेने शस्त्र चालविणे.
**शल्यतन्त्रे प्रवेशमार्गेणैव शल्यस्याहरणं प्रतिलोमं, तद्विपरीतमनुलोमम्** ( सुसू. २७.६ )
शरिरांत शल्य ज्या दिशेने—द्वाराने घुसले—शिरले त्या द्वाराने काढणे याला प्रतिलोम व शल्याग्राच्या दिशेने—प्रतिलोमाच्या विपरीत काढणे ह्याला अनुलोम म्हणावे.
**—ग**—वि., **अधोगम्** ( चिनि. २.१७ )
खाली जाणारे ( रेचक )
**—अधोमार्गगतः—व्याध्यादिः** ( चइ. ७.२० )
नाभीच्या खालच्या भागात होणारे रोग इत्यादी.
**—विशोधन**—न., **उपक्रम०, अधोमार्गेण शोधनं विरेचनं बस्तिश्च** ( काखील. ७.३ ) अधो मार्गाने मल दोषांची शुद्धि करणारे रेचक, बस्ति इत्यादि.
**—संभाषा**—स्त्री., **वादप्रकार०, सन्धायसंभाषा** ( चवि., ८.१७ ) वादाचा प्रकार. शास्त्राचा बोध होण्याच्या दृष्टीने करावयाचा वाद; संवाद.
**—हरण**—न., **उपक्रम०, रेचनम्, अधोमार्गेण मलनिस्सरणम्** ( चवि., ७.२७ ) अधोमार्गाने मल घालवण्याचा उपाय, रेचक, मूत्र रेचक, बस्ति.

**अनुलोमता**—स्त्री., **अधोमार्गेण सुखेनैव निःसरणम्** ( चसू., १६.६ ) अधोमार्गाने सुखाने मळ, वात, मूत्र, शुक्र, रज निघणे—सरणे.

**अनुलोमन**—न., **उपक्रम०, संशोधनं—तस्य साधनं विरेचनं बस्तिश्च** ( सुचि., १४.९ )
शोधन ( विरेचन, बस्ति इ. )
**अनुलोमगत्या मूढगर्भादिशल्याहरणम्** ( सुशा. १०.१० )
योनि इ. अधो द्वारातून मूढ गर्भ—अडलेला गर्भ इत्यादि शल्यांचे हरण करणे.
वि., **वातादीनामधःप्रवर्तनम्** ( सुसू. ४६.३१९ )
वात, मल, मूत्र, शुक्र, रज यांची सुखाने प्रवृत्ति होणे.

**अनुलोमनी**—वि., **अनुलोमकारिणी** ( अहसू. ८.१६ )
अनुलोमन करणारी.

**अनुल्बण**—वि., **अनुद्धतः** ( अहसू. २.३१ )
भडक नसलेला; उत्तान नसलेला. साधा स्वच्छ ( वेश )

**अनुवक्रग**—वि., **ग्रहः समाक्रान्तं राशिं मुक्त्वा पुनः भुक्तराशिं नक्षत्रं वा याति स वक्रगः, पुनश्चानुगत एवोत्तरस्थानेऽनुवक्रगः ।** ( सुसू. ३२.४ )
ज्या राशीतून किंवा नक्षत्रातून ग्रह जात आहे ती राशि वा नक्षत्र ( मागे वळून ) सोडून परत येणारा ग्रह वक्रग. पुन्हा पुढील नक्षत्रात वा राशीत जाणारा ग्रह अनुवक्रग.

**अनुवर्ण**—न., **रसक्रियायां निर्दिष्टभागादधिकद्रव्यप्रक्षेपणम्** ( र. ८.४९ )
रसक्रियेमध्ये सांगितलेल्या प्रमाणापेक्षा अधिक द्रव्य घालणे.

**अनुवर्तन**—न., **यथापूर्ववर्तनम्** ( चसू. १६.६ )
**अनुविधानं, स्वीकरणम्** ( चसू. १३.१३ )
पूर्वी प्रमाणे होणे, स्वीकारणे, घेणे.
( परिव. ) **अनुकूलवर्तनम्** ( सुशा. १०.४६ )
अनुकूल वर्तन.

**अनुवर्तमान**—वि., ज्वरादीनां विकाराणां बलवत्त्वेन दीर्घकालमनुवर्तनम्, परस्परबलमभिवर्धयन्, एककालं वर्तमानो वा ( चवि. ६.८ )
ज्वरादि विकारांचे प्राबल्याने दीर्घकाल अस्तित्व. विकारांनी परस्परांचे बल वाढविणे किंवा एका वेळी—काळी असणे.

**अनुवासन**—न., उपक्रम०, स्नेहः ( चवि. ८.१५० )
स्नेहबस्तिः ( चसू. १.९० )
तैलप्रधानो बस्तिः ( चसू. २.१४ )
'अनुवसन्नपि न दूषयति अनुदिवसमपि वा दीयते इत्यनुवासनम्' ( सुचि. ३५.१८. )
अनुवासनं यथार्हौषधसिद्धः स्नेहनार्थे स्नेहः स्नेहविधौ, स चतुर्धा अभिहितः। ( असंसू. २८.७ )
अनुवासनप्रकारा द्रव्याणि च—
"अनुवासनं तु स्नेह एव। स्नेहस्तु द्विविधः स्थावरात्मको जङ्गमात्मकश्च। तत्र स्थावरात्मकः स्नेहस्तैलमतैलं च। तद्द्वयं तैलमेव कृत्वोपदेक्ष्यामः, सर्वस्तैलप्राधान्यात्। जङ्गमात्मकस्तु वसा मज्जा सर्पिरिति। तेषां तैलवसामज्जासर्पिषां यथापूर्वं श्रेष्ठं वातश्लेष्मविकारेषु अनुवासनीयेषु, यथोत्तरं तु पित्तविकारिषु, सर्व एव वा सर्वविकारेष्वपि योगमुपयान्ति संस्कारविधिविशेषादिति।"
( चवि. ८.१५० )
मात्राबस्तिरपि अनुवासनस्य भेद एव
( असंसू. २८ )
उत्तरबस्तिरपि स्नेहनेऽनुवासनवत्। ( असंसू. २८ )
अनुवास्याः—य एव आस्थाप्यास्त एवानुवास्याः। रूक्षातिदीप्ताग्नयः केवलानिलार्ताः च विशेषेण
( चसि. २.१९ )
अननुवास्याः—य एव अनास्थाप्यास्त एवाननुवास्याः तथा निरन्नपाण्डुरोगकामलाप्रमेहप्रतिश्याय-प्लीहकफोदराढ्यवातवर्चोभेदार्तपीतविषगरपित्तक-फाभिष्यन्दगुरुकोष्ठातिस्थूलश्लीपदगलगण्डापचीकृ-मिणकोष्ठाः। ( असंसू. २८ )
अनुवासनमात्रा—मध्यवयस्कमाश्रित्य अनुवासनस्योत्तमादिमात्राभेदेन त्रैविध्यमुक्तम् यथा—षट्पली तु भवेच्छ्रेष्ठा मध्यमा त्रिपली भवेत्। कनीयस्यर्ध-र्धपला त्रिधा मात्राऽनुवासने। गयी तु यथा प्रमाणविहिताच्च बस्तेः पादांशः स्नेहबस्तिः स्नेहविकल्पोऽर्धमात्रापकृष्टोऽनुवासनं, तस्यापि विकल्पः अर्धमात्रा प्रकृष्टोऽपरिहार्यो मात्राबस्तिरिति।



एतेन तन्मते षट्पलप्रमाणः स्नेहबस्तिः तदर्धेन पलत्रयप्रमाणमनुवासनम्। तस्यार्धेन सार्धपलप्रमाणः मात्राबस्तिरिति ( सुचि. ३५.१८ )
अनुवासनस्य विधिः कालश्च—
'विरेचनात्सप्तरात्रे गते जातबलाय वै।
कृतान्नायानुवास्याय सम्यग्देयोऽनुवासनः॥
( सुचि. ३७.३ )
यः अनुवासनार्हः तस्य साधुतया अभ्यङ्गस्तथोष्णाम्बुना शनैः स्वेदनं करणीयम्। अनन्तरं शास्त्रानुसारेण भोजनं कृत्वा चङ्क्रमणं कार्यम्। शकृन्मूत्रविसर्जनानन्तरं तस्मै अनुवासनं ( अनुवासनबस्तिः ) देयम्; अनुवासनस्य निरूहोक्तविधिना प्रणिधानं कार्यम्। ( सुचि. ३७.५८—५९ )
अनुवासनबस्तिप्रदानानन्तरं वाक्शतपर्यन्तं हस्तपादाद्यङ्गानि प्रसार्य उत्तानावस्थायामेव तिष्ठेत्। गात्रप्रसरणात् स्नेहवीर्यं सर्वशरीरे विसर्पति। अनन्तरं तस्य हस्तपादतलयोः स्फिचोश्च ( स्नेहस्य शीघ्रागमननिषेधार्थम् ) शनैः शनैस्त्रीन् त्रीन् वारान् ताडयेत्। तदनन्तरमातुरेण सह शय्यां त्रीन् वारानुत्क्षिपेत्। एवं दत्तबस्तौ तेन पुरुषेण मन्दायासं मितभाषणं च कर्तव्यम्। स्वास्तीर्णायां शय्यायां यथेच्छम् आसीत। स्नेहाचारिके तेन मनेन भाव्यम्।
( सुचि. ३७.६०—६२ )
सम्यगनुवासितस्य लक्षणम्—
सम्यगनुवासितस्य पुरुषस्य दत्तोऽनुवासनबस्तिः अनिलेन पुरीषेण च सह शीघ्रं त्रिचतुरादियामात् प्रत्यागच्छति। अत्र ओषचोषादिवेदना न भवन्ति।
( सुचि. ३७.६७ )
अनुवासनोपगानि द्रव्याणि यानि अनुवासनक्रियायां साहाय्ये नोपगच्छन्ति। ( चसू. ४.८ )
अनुवासनोपग - गणः 'रास्नासुरदारुबिल्वमदनशतपुष्पावृश्चीरपुनर्नवाश्वदंष्ट्राऽग्निमन्थश्योनाका इति दशेमान्यनुवासनोपगानि भवन्ति।'
( चसू. ४.१३ )
एक उपचार. स्नेह; तेल तूप इत्यादि स्नेहांचा बस्ति. तेल ज्यात मुख्य आहे असा बस्ति.
जवळ असूनही जो दूषित करीत नाही अथवा दररोजही दिला जातो तो अनुवासन. शरिराचे स्नेहन व्हावे याकरिता योग्य औषधांनी सिद्ध केलेला स्नेह स्नेहविधीमध्ये सांगितला आहे. ( तो चार प्रकारचा—तेल, तूप, वसा, मज्जा. )

अनुवासन म्हणजे स्नेहच. तो स्थावर व जंगम असा दोन प्रकारचा. स्थावर तेल किंवा थोडे तेल असलेला पदार्थ. तेल हेच प्रधान म्हणून ते दोन्ही तेल म्हणूनच समजावे. जंगम स्नेह म्हणजे तूप, वसा व मज्जा. तेल, वसा, मज्जा, तूप यातून वात कफ विकारात पहिले तेल हे सर्वात श्रेष्ठ, व पित्तविकाराकरिता तूप हे सर्वात श्रेष्ठ. तूप व सर्व स्नेह संस्कारांनी सर्वविकारांत उपयुक्त. मात्रा बस्ति हा अनुवासनाचाच एक प्रकार. उत्तर बस्ति सुद्धा अनुवासनासारखाच स्नेहनात आहे. **अनुवासनास योग्य**–जे निरूहास योग्य तेच अनुवासनास योग्य होत. त्यात विशेषतः जे रूक्ष अति दीप्त अग्नि असलेले व केवळ वाताने पीडलेले ते. **अनुवासनाला अयोग्य**–जे निरूहास अयोग्य ते. तसेच अन्न न घेतलेले, पांडु, कामला, प्रमेह, पडसे, प्लीहा, कफोदर, ऊरुस्तंभ, मल, मेदपीडित, मद्यपी, विष, गर, पित्त कफाने डोळे येणे, जड कोठा, अति-स्थूल, हत्तीपाय रोग, गलगंड, न पिकणाऱ्या जुन्या गंडमाळा, कृमि होण्याची कोठ्याला सवय असलेले. **अनुवासनाची मात्रा**–मध्यमवयी मनुष्याला सहा पले उत्तम; तीन पले मध्यम; व दीड पल लहान मात्रा; अशी तीन प्रकारची मात्रा होय. **गर्गाचे मत**– निरूहबस्तीच्या एक चतुर्थांश स्नेह बस्ती, यापेक्षा स्नेह अर्धा कमी अनुवासन व ह्यात अर्धा कमी मात्राबस्ति होय. या मतानुसार सहा पले स्नेहबस्ति, तीन पले अनुवासन व दीड पल मात्रा बस्ति. त्याचा **विधि व काल**–रेचक देऊन सात दिवसानंतर नेहमी सारखी शक्ति आली, अन्न नेहमीचे आहारात घेत असला की अनुवासन द्यावा. त्याला चांगला अभ्यंग करावा, ऊनपाण्याने हळू हळू शेकून, योग्य जेवण करून थोडे फिरावे, शौच व मूत्रविसर्जन करून अनुवासन द्यावा तो निरूहाप्रमाणेच द्यावा. नंतर शंभर अक्षरे मोजी पर्यंत हातपाय पसरून उताणेच पडावे, अव-यव पसरण्याने स्नेहाचे वीर्य सर्व शरिरात पसरते. नंतर स्नेह त्वरित परत येऊ नये म्हणून तळहात, तळपाय व ढुंगण यांवर तीन वेळा ठोकावे. नंतर रोग्यासह खाट तीन वेळा वर उचलावी. या नंतर रोग्याने मितभाषी असावे व कमी हालचाल करावी. यथेच्छ हातपाय पसरून अंथरुणावर आडवे असावे. स्नेहनाचे सर्व नियम पाळावेत. **अनुवासन चांगले लागू झाल्याचे लक्षण**–अनुवासन बस्ति वात व मळ यांबरोबर तीन चार प्रहरांनी वेगाने बाहेर येतो. आग, दाह इ. सारखी वेदना होत नाही. अनुवासनोपग गण–रास्ना, देवदार, बेल, गेळफळ, बडीशेप, दोन्ही पुनर्नवा, गोखरू, अरणी, व टेंटु–ही द्रव्ये अनुवासन चांगले व्हावे म्हणून उपयोगी पडणारी होत.

**अनुवासित**–वि., **दत्तानुवासनः** ( असंसू. २८.४६ ) ( सुचि. ३८.३ )
ज्याला अनुवासन बस्ति दिला आहे तो.

**अनुवास्य**–वि., **अनुवासनयोग्यः** ( चसि. २.१९ )
अनुवासन बस्ति ज्याला देणे आवश्यक आहे तो.

**अनुविद्ध**–वि., **मिश्रितम्** ( सुनि. ६.१० )
मिश्रित; मिसळलेला.

**अनुवृत्ति**–स्त्री., **सातत्यम्** ( चसू. १२.८ )
सततपणा, अखंड. मध्ये खंड न पाडता पुनः पुनः क्रिया करणे.

**अनुवेल्लित**–न., **व्रणबन्ध०, अनुवेल्लितं शाखासु** ( सुसू. १८.१७ ) शाखासाठी ( हातपाय ) उप-योगात आणावयाचा व्रणादि बांधण्याचा पट्टा.

**अनुशय**–पु., **अनुबन्धः, अनुसृत्य सम्बन्धः, सतत-सम्बन्धः, प्राप्तिः** ( चसू. २१.१२ )
पाठोपाठ असलेला. लगेच मागच्या क्रमात असलेला संबंध. नित्य संबंध. प्राप्ति.
**कोपः** ( चचि., ६.३ ) **उपाधिः** ( काखिल. १.२२)
प्रकोप, उपाधि.

**अनुशयी**–स्त्री., **क्षुद्ररोग०, कफान्मस्तके जायमाना सवर्णा अल्पसंरम्भा अन्तःप्रपाका गम्भीरपिटिका** ( सुनि. १३.२३ ) एक रोग. डोक्यावर होणारी पुळी. ती कफाने होते, त्वचेच्या रंगाची, थोडा क्षोभ असलेली, आत पिकणारी, खोल पुळी.

**अनुशस्त्र**–न., **हीनशस्त्रं शस्त्रसदृशं वा, शस्त्रकर्मसाधक-द्रव्यान्तरम्** ( सुसू. ८.१५ ) शस्त्र नसून शस्त्राचे कार्य करणारे, शस्त्र कर्माने जे साध्य करावयाचे ते साध्य करणारे शस्त्राखेरीज इतर द्रव्य.
**अनुशस्त्राणि तु जलौकःक्षाराग्निसूर्यकान्तकाचस्फ-टिककुरुविन्दनखशाकशेफालिकादिखरपत्रसमुद्रफेन-शुष्कगोमयादीनि** ( असंसू. ३४.३२ ) ( अहसू. २६.२७ )
अनुशस्त्र–जळू, क्षार, अग्नि, सूर्यकांत, काच, स्फटिक, कुरुंद, नख, खरखरीत पाने. ( साग, पारिजातक इत्यादींची ) समुद्रफेस, सुकलेली शेणी इ.

**अनुशासन**–न., उपदेशः (**कावि**) शिष्योपक्रमणीय०
उपदेश. शिष्याला शास्त्रोपदेश ज्यात केलेला आहे तो.

**अनुशिष्टिप्रतिकार**–वि., **आज्ञाधारकः** ( चवि. ८.८ )
आज्ञाधारक.

**अनुषङ्गिन्**–वि., **पुनर्भावि** ( चसू. २५.४० )
पुन्हा होणारा.
**चिरकालस्थायी** (चचि.२१.३४) चिरकाल राहणारा.

**अनुष्ण**–वि., **अल्पोष्मा** ( चचि. ३,२८१ ) थोडे उष्ण.
–**वल्लिका**–स्त्री., **वनस्पति० नीलदूर्वा** ( रा. ८.२२६ )
हिरवी दूर्वा.
–**वृक्ष**–पु., **वनस्पति० शीतवीर्ययुक्तो वृक्षः यथा–क्षीरिवृक्षः** ( सुसू. ३७.२३ )
शीत वीर्य असलेला वृक्ष, जसे वड इ. क्षीरीवृक्ष; ( दूध निघणारे वृक्ष ).

**अनुसन्दिग्ध**–वि., **सन्देहयोग्यो विषयः**
( चवि.८.४३ ) शंका निर्माण होऊ शकणारा विषय.

**अनुसमाधि**–पु., **अनुष्ठानम्** ( चशा. ४.४१ )
आचरण करणे.

**अनुसुख**–अ., **यथासुखम्** ( सुशा. १०.९ )
सुखाप्रमाणे. सुखावह वाटेल असे.

**अनूक**–न., **सादृश्यम्** ( चशा. ४.३६ ) सारखेपणा.
**प्राक्तनी अव्यवहिता जातिः** ( चशा. २.२७ )
पूर्वजन्माची जी देहजाति होती ती.
**शीलम्** ( सुशा. ४.६७ ) **स्वभावः, स्वररूपचेष्टानुकरणम्** ( अहृशा. ३.८९ ) स्वभाव.
स्वभाव, स्वर, रूप, हालचाल यांचे अनुकरण.

**अनून**–अ., **निरवशेषेण साकल्येन** ( काखिल., ५.२६ )
निःशेष, सर्व.

**अनूप**–वि., **अम्बुप्रायदेशविशेषः, 'प्रचुरोदकवृक्षः निवातः दुर्लभातपः बहुदोषश्च अनूपः'** ( चवि.३.४८ )
**सोऽहितदेशानामग्र्यः**, ( चसू. २५.४० )
**अनुगता आपो यस्मिन् सोऽनूपः** ( चसू. १९.१६ )
ज्या देशात पाणी पुष्कळ आहे असा देश. ज्यात पाणी व झाडे फार आहेत, वारा कमी, ऊन दुर्लभ, शरिरात दोष फार होण्याची प्रवृत्ति, तो देश. मानवी प्रकृतीला जे अहितकर देश त्यात अनूप प्रमुख.
–**ज**–न., **वनस्पति०, आर्द्रकम्** ( ध. २.८४ )
( रा. ६.१३२ ) आले.

**अनूपालु**–पु., **वनस्पति०, पानीयालुः,**
**गुणाः–पानीयालुस्त्रिदोषघ्नः संतर्पणकरः परः,**
पाण्यात होणारा आळू. ( रा. ७.३१ )
गुण–त्रिदोष नाशक व अतिपुष्टिकर.

**अनृजु**–न., **वनस्पति०, तगरम्** ( ध. ३.५३ )
तगर.

**अनृतु**–पु., **रजःस्रावेतरकालः** ( सुशा. २.१८ )
रजःस्रावाचे दिवस सोडून बाकीचे दिवस.

**अनेकशफ**–वि., **विभक्तखुरः छागादिपशुः**
( सुसू. ४६.४३३ )
ज्यांचे खुर विभागलेले असतात ते बोकड इ. पशु.

**अनेकाग्र**–वि., **व्याकुलचित्तः** ( असंशा. १०.२१ )
( चइ. ११.३ ) व्यग्र मनाचा. व्याकुळ अंतःकरणाचा. अनेक ठिकाणी मन असलेला.

**अनेकान्त**–पु., **तन्त्रयुक्ति०, 'क्वचित्तथा क्वचिदन्यथा इति यः, सः अनेकान्तः' यथा–केचिदाचार्या ब्रुवते द्रव्यं प्रधानं केचिद्रसं केचिद्वीर्यं केचिद्विपाकमिति ।** ( सुउ. ६५.२४ )
एखाद्या विषयाबद्दल एक मत असे आहे व दुसरे मत निराळे आहे, अशा विषयाला अनेकान्त म्हणतात. उ. द्रव्य प्रधान असे एकमत तर रस, वीर्य, विपाक ही प्रधान अशी अन्य मते असणे.

**अनौषध**–न., **दोषकोपनद्रव्यम् तद् द्विप्रकारम्, बाधनम् अनुबाधनं च; तत्र सद्यःप्राणहरं बाधनं, कालान्तरेण प्राणहरम् अनुबाधनम्** ( असंसू. १२ )
**वि., अचिकित्सितम्, चिकित्सायामौषधिरूपेणानुपयुक्तम्** ( अहृसू. ९.१० )
दोष प्रकोपक द्रव्य. ते २ प्रकारचे, बाधन व अनुबाधन, तत्काल प्राणहारक ते बाधन व कालांतराने प्राणहारक ते अनुबाधन.
चिकित्सेमध्ये औषध म्हणून निरुपयोगी.

**अनौषधिभूत**–वि., **व्याधिनिवारणेऽनुपयुक्तम्**
( सुसू. ४१.५ ) रोगनिवारणाकरिता निरुपयोगी.

**अन्त**–पु., **मरणम्** ( चइ. १.२२ ) मरण.
**समाप्तिः, निर्णयः, "वादान्सप्रतिवादान् हि वदन्तो निश्चितानिव । पक्षान्तं नैव गच्छन्ति तिलपीडकवद्गतौ ॥** ( चसू. २५.२७ )
समाप्ति, निर्णय, टोक. आपापल्या पक्षाचे मुद्दे निश्चित असल्याप्रमाणे मांडूनही वादी प्रतिवादी कोणत्याच निर्णयात्मक स्थितीला पोचत नाहीत अशी स्थिती.
**उत्तरकालः** ( चइ. ६.१८ ) शेवटचा काल.
**हस्तपादाद्यन्तिममङ्गम्** ( चइ. ९.६ सुउ. ४४.३९ )
हातपाय इ. शेवटचे अवयव.
**कनीनिकापाङ्गम्** ( सुउ. १८.६६ )

डोळ्याचा आतला कोपरा ( कनीनिका ) व बाहेरचा कोपरा ( अपांग )

**अन्तक**–पु., रोग०, **संनिपातज्वरभेदः, तल्लक्षणम्–दाहं परितापनं च करोति, मोहं ददाति, शिरःप्रकम्पं विदधाति, हिक्कां तनोति, कसनं च करोति। असाध्योऽयम्, मर्यादा त्वस्य दश दिनानि। ( मा ज्वरः )** एका सन्निपात ज्वराचे नाव. लक्षणे–दाह, अंग तापणे. विचारशक्ति मंदावणे, डोके सारखे हलणे, उचकी, खोकला. ज्वराची मर्यादा दहा दिवस. हा ज्वर असाध्य.

**अन्तर्**–अ., मध्ये ( सुसू. ३२.४ ) आंत.

**–गल**–पु., शारीर०, **गलस्यान्तर्भागः** ( चसू. १८.२२ ) गळ्याचा आतील भाग.

**–गृह**–न., **मध्यगृहम्** ( सुचि. २७.८ ) माजघर, घराचा मधला भाग.

**–ज**–वि., **अन्तर्मार्गाश्रितः** ( चचि. २१.२७ ) अंतर्मार्गात असलेला, उद्भवलेला.

**–दाह**–पु., **चत्वारिंशत्पित्तविकारेष्वेकः** ( चसू. २०.१४ ) ४० पित्तविकारांपैकी एक. लक्षण०, **शरीरस्यान्तोऽन्त्रादावुष्णस्पर्शरूपो दाहः** ( चचि. ३.३९ ) **कोष्ठे दाहः** ( असंसू. २० ) जठर, आंतडी इ. आतल्या अवयवात होणारा उष्ण-स्पर्शरूप दाह. अन्तःकोष्ठातील दाह.

**–धूम**–वि., संस्कार०, **शरावे प्रस्थापितस्यौषधिद्रव्यस्य पिधानान्याच्छाद्याधस्तादग्नौ तथा पचनं यथा धूमो न बहिर्गच्छति** ( चचि. १५.१७५ ) ( र. २८.३२ ) संपुटात एखादे द्रव्य ठेवून झाकणाने संपुट बंद करून विस्तवावर ठेवणे; यात औषधी द्रव्य जळताना धूर बाहेर येऊ नये ही योजना.

**–नखमुष्टि**–पु., स्त्री., **अन्तरीकृतनखमुष्टिपरिमाणम्** ( चक. १.१४ ) **अन्तर्नखा मुष्टिः, यस्मिन्मुष्टौ नखानि न दृश्यन्त इत्यर्थः** ( असंक. १ ) नखे आत असलेली मूठ. नखे दिसणार नाहीत अशी मूठ.

**–महानाद**–पु., भैषज्य०, **शङ्खः** ( रा. १३.२४३ ) शंख

**–मुख**–वि., **मुखान्तर्गतम्** ( सुशा. ८.८ ) तोंडात असलेला–गेलेला.

न., शस्त्र०, **अध्यर्धमङ्गुलफलं केशप्रमाणधारमष्टाङ्गुलप्रमाणदीर्घं जिह्वाधारमर्धचन्द्राननं मध्यमुखं विस्रावणोपयोगि शस्त्रम्** ( सुसू. ८.३ ) एक शस्त्र. दीड अंगुलाचे पाते, केसाप्रमाणे सूक्ष्म व तीक्ष्णधार, आठ अंगुळे लांब, अर्धचंद्रासारखे मुख मध्यभागी असलेले; स्राव करण्याच्या कामी येणारे शस्त्र.

**–मुखमुष्टि**–स्त्री., **अन्तर्नखमुष्टिः** ( असंक. १ ) पहा. अंतर्नख मुष्टि.

**–मुखी**–स्त्री., योनिव्यापद्०, **विंशतियोनिरोगेष्वेकः** ( चचि. ३०.३०–३१ ) **तल्लक्षणम्–अत्याशितायाः सुरते विषमं स्थितायाः वायुरन्नेनोत्पीडितः सन् योनेः स्रोतसि स्थितश्च सन् सास्थिमांसं तीव्ररुजं योनेर्मुखं वक्रयेत् साऽन्तर्मुखी, वक्रमुखी वा** ( असंउ. ३८ ) वाकडी योनि. वीस योनि रोगांपैकी एक. अतिजेवण केल्यावर वेड्यावाकड्या अंगाने संभोग घेणारीचा वायु अन्नाने पीडित होऊन योनीचे तोंड वाकडे करतो. अस्थि, मांस यात तीव्र वेदना होतात.

**–मृत**–वि., **गर्भकुक्षौ मृतः** ( सुनि. ८.१२ ) गर्भाशयात मेलेला गर्भ.

**–लोहित**–वि., लक्षण०, **कोष्ठमध्यपतितं रुधिरम्** ( सुचि. २.५१ ) ज्याच्या आतडी इ. आतल्या अवयवात रक्तस्राव झाला आहे असा. **यस्य कोष्ठमध्ये रक्तस्य स्रावः, बहिरनिःसृतरक्तम्** ( मा. १७ ) कोठ्यात रक्तस्राव झालेला. बाहेर न स्रवणारे रक्त.

**–वक्त्रदाह**–पु., **अन्तर्मुखे दाहः** ( असंसू. ८ ) तोंडाच्या आत होत असलेला दाह.

**–वत्नी**–स्त्री., **गर्भिणी** ( चशा. ८. १६ ) गर्भिणी.

**–विद्रधि**–स्त्री., **शरीरस्यान्तरङ्गेषूत्पन्नो विद्रधिः** ( सुसू. ४३.३ ) ( सुशा. ८.१७ ) अंतरवयवात झालेला विद्रधि.

**–वेग**–वि., **अन्तःकोष्ठादौ वेगो नाम गतिर्यस्य सः** ( चचि. ३.३३ ) अंतरवयवावर अनिष्ट परिणाम करणारा. आत गेलेला.

**अन्तर**–न., **अवकाशः, छिद्रम्** ( सुशा. ९. १३ ) भोक, छिद्र.

**अवसरः, कालः** ( सुउ. ३९. ३२० ) काळ, काळाचे अंतर.

**मध्यम्** ( सुसू. ३५. १२ ) मध्य-आतला भाग. आत.

**कारणम्** ( चसू. २७.३४७ ) कारण.

**–पान**–न., **पाचनम् ( औषधम् )** ( चसि.८.२३ ) पिण्याचे पाचक औषध.

**–पानक**–न., क्वाथः, पानम् ( असंउ. २. ) काढा.

**–भक्त**–न., औषधकाल०, यत्पूर्वाह्णभक्ते जीर्णे मध्याह्ने भेषजमुपयुज्यते, तस्मिंश्च जीर्णे पुनरपराह्णे भोजनम् ( असंसू. २३ ) सकाळचे जेवण जिरल्यानंतर माध्यान्ही जे औषध दिले जाते व ते जिरल्यानंतर पुन्हा तिसरे प्रहरी जेवण घेणे. दोन जेवणांमधला औषधाचा काळ.

**अन्तराग्नि**–पु., जठराग्निः ( चचि. १५.२१४ ) ( सुचि. ३१.५६ ) पाचकाग्नि. अन्नपाचक.

**अन्तरा**–अ. मध्ये ( सुचि. ३७.७० ) मध्ये.

**–भक्त**–न. औषधकाल०, यत्पूर्वापरयोर्भक्तयोः प्रातःसायन्तनयोर्भोजनयोः अन्तरा–मध्ये पीयते ( सुउ. ६४.७३ )

दुपारचे ( पूर्व ) व सायंकाळचे ( अपर ) या दोन जेवणांच्या मधल्या काळात औषध घेतले जावे हा औषधकाल अंतरा भक्त म्हटला जातो.

**अन्तरात्मन्**–पु., जीवः, आत्मा ( चशा. ४.८ ) अंतरात्मा, आत्मा, जीव.

**अन्तराधि**–पु., शिरोबाहुसक्थिवर्ज्यः, सर्वो मध्यमः भागः, अन्तरा धीयन्ते शिरःप्रभृतयः पञ्चावयवा यस्मिन् ( चशा. ७.५ ) ( सुसू. ३५.१२ ) डोके, बाहू, मांड्यां खेरीज शरिराचा मधला भाग.

**अन्तरायाम**–पु., वातरोग०, तल्लक्षणम्–अन्तरायम्यते ग्रीवा, मन्या च स्तभ्यते, भृशं दन्तानां दशनं, लाला, पृष्ठायामः, शिरोग्रहो, जृम्भा, वदनसङ्गश्च ( चचि. २८.४३–४४ ) तत्संप्राप्तिः–यदा वातो मन्ये संस्तभ्यान्तर्धमनीरुपेत्य सकलं देहं व्याप्नोति तदा जत्रुरायम्यतेऽङ्गमन्तर्धनुरिव भवति, नेत्रयोः स्तम्भं कफोद्गमं च करोति ( असंनि.१५ ) आतला धनुर्वात. ज्या धनुर्वातात शरीर आत पोटाच्या बाजूला वाकते तो. लक्षणे–मान आत वाकते, ताठरते, दात चावणे, लाळ गळणे, पाठ ताणणे, डोके जखडणे, जांभई, तोंड मिटते. संप्राप्ति–जेव्हा वात मन्या नामक धमन्यात येऊन सर्व शरीर व्यापतो, तेव्हा मान ताठते, आंग धनुष्यासारखे आत वाकते, खवाड्याचे भाग ताणले जातात, डोळे थिजतात. व कफाची वांती होते.

**अन्तराशय**–पु., महास्रोतः ( चक. १२.५२ ) आतले आशय ( आमाशय–जठर आतडे इ. ) सर्व पचन मार्ग.

**अन्तराश्रय**–पु., कोष्ठम् ( चचि. २५.२६ ) आतल्या अवयवांचा आश्रय. कोष्ठ, कोठा.

**अन्तरिक्ष**–न., खनिज., अभ्रकम् ( रा. १३.२ ) अभ्रक.

**–जल**–न., दिव्योदकम् ( रा. १४.३२० ) आकाशातून पडलेले ( पावसाचे ) शुद्ध पाणी.

**अन्तरिक्षानुकारिन्**–वि., आन्तरिक्षं जलं यदनुकरोति ( अहृसू. ५.५ ) पावसाच्या शुद्ध पाण्याच्या खालोखाल–जवळच्या गुणाचे पाणी.

**अन्तरूष्मन्**–पु., दोषधातुमलसन्निपातजनितोऽग्निः ( असंशा. ६ ) अन्नपाचक अग्नि. हा अग्नि दोष, धातु, मल, यांच्या अग्नींच्या एकत्रीकरणाने–एकीकरणाने निर्माण झालेला असतो.

**अन्तः–कुक्षि**–पु., गर्भाशयान्तर्भागः ( चशा. ६.२२ ) गर्भाशयाचा अंतर्भाग.

**–कोटरपुष्पी**–स्त्री. वनस्पति०, नीलबुध्ना ( चसू. १.८२ )

नीलबुध्ना किंवा काळीबुध्ना नावाची वनस्पती.

**–कोष्ठ**–पु., आभ्यन्तरमार्गः ( चसि. २.९ ) सर्व पचनमार्ग. महास्रोतस्.

**–परिमार्जन**–न., भेषज०, यदन्तःशरीरमनुप्रविश्य व्याधीन्प्रमार्ष्टि तद्भेषजम् ( चसू. ११.५५ ) जे औषध पचन मार्गात कार्य करून आहारापासून उत्पन्न होणारे रोग-दोष बाहेर काढते–शरीरातून घालवते ते.

**–प्रविष्ट**–वि. अन्तराकृष्टं जिह्वादि ( चसि. ६.५४ ) आत गेलेले जीभ इ. अवयव.

**–शल्य**–वि., अन्तर्गतं शल्यं यस्मिंस्तत् ( अहृसू. २८.२ ) ज्या शरिरात सलणारी–खुपणारी वस्तु आत गेली आहे ती.

**अन्त्य**–वि., मरणस्वरूपम् ( चइ. १२.४४ ) शेवटचे. मरणासारखे.

**अन्त्यावसायिनी**–स्त्री., चण्डाला स्त्री ( चशा. ८.५२ ) चांडाळीण.

**अन्त्र**–न., शारीर., कोष्ठाङ्ग. ( सुशा. ५.९ ) कोठ्याचे एक अंग, आतडे.

**तदुत्पत्तिः–रक्तश्लेष्मप्रसादाद्भवति** ( सुशा. ४.२६–२७ )

**रक्तमांसप्रसादादन्त्राणि** ( असंशा. ५.४८ )

**द्विकान्यन्त्राणि स्थूलक्षुद्रभेदेन बृहल्लघुभेदेन वा** ( सुशा. ५.६ )

**आयामः–सार्धत्रिव्यामान्यन्त्राणि पुंसाम्, स्त्रीणामर्धव्यामहीनानि** ( सुशा. ५.९ )

उत्पत्ति—रक्त व कफ यांच्या प्रसादरूप अंशांपासून होते. रक्त मांस यांच्या प्रसादांशापासून होते. मोठे व लहान दोन प्रकारचे आतडे असून ते ३॥ वाव पुरुषाचे व ३ वाव स्त्रीचे असते.

**शुष्कान्त्रम्, उपयन्त्रेष्वेकम्** ( अहृसू. २५.४० ) **शस्त्रच्छेदानन्तरं सिरादिबन्धनार्थमस्य प्रयोगः।**
एक उपयंत्र. शस्त्राने छेद घेतल्यानंतर शीर इत्यादि बांधण्यास उपयुक्त.

**—कूज**—पु., **रोगलक्षण, अव्यक्तशब्दः गुडगुडादिशब्दो वा पक्वाशयस्थकुपितवातकृतः** ( सुनि. १.२३ )
पक्वाशयस्थ कुपित वाताने पोटात गुडगुड, कुरकुर इ. प्रकाराने रोग्याला भासमान होणारा शब्द.

**—कूजन**—न. **रोगलक्षण०, अन्त्रकूजः** ( सुक. ३.८ ) पहा 'अन्त्रकूज'.

**—पाचक**—न. **स्थावरविषभेदः, सप्तसु त्वक्सारनिर्यास-विषेषु एकम्** ( सुक २.५ )
वनस्पतिज विषांपैकी एक विष. त्वचा, नार, डिंक इत्यादि विषांपैकी एक.

**—पूरण**—न. **रोगलक्षण०, अन्त्राशयेऽभिन्नेऽपि सूक्ष्मैः, खैः अन्त्रस्य रक्तेन पूरणम्, तेन अन्त्राशयस्य गौरवं भवति** ( सुचि. २.१८ )
अंत्रात रक्तस्राव होऊन तो भरणे. त्यावेळी अंत्राचा भाग जड वाटतो.

**—भेदन**—न., **रोगलक्षण०, अन्त्रे भेदनवद् वेदना भवति** ( चचि. १३.१४ )
आंतड्यात फोडल्या सारखी वेदना होणे. फूट लागणे.

**—वर्ध्मन्**—**रोग०, अन्त्रवृद्धिः** ( अहृसू. २५.३६ ) अंतर्गळ.

**—वल्लिका**—स्त्री., **वनस्पति०, सौम्या** ( रापरि. ३.३१ )
सोमवल्लीच्या गुणासारख्या गुणांची एक वेल.

**—वृद्धि**—स्त्री., **रोग०, तत्संप्राप्तिर्लक्षणं च—भारहरणाद्यायासविशेषैः प्रकुपितो वायुः स्थूलान्त्रस्येतरस्य चैकदेशं क्षुद्रान्त्रावयवं वा विगुणमादाय स्वनिवेशादधो गत्वा वङ्क्षणसंधिमुपेत्य तत्र ग्रन्थ्याभं श्वयथुं करोति, तदुपेक्षणेन कालान्तरेण फलकोशं प्रविश्य मुष्कवृद्धिं करोति, आध्मातो बस्तिरिवाततः प्रदीर्घो भवति, अवपीडितश्च सशब्दमूर्ध्वमुपैति, विमुक्तश्च पुनराध्मायते।**
( सुनि., १२.६ ) ( अहनि. ११.२९ )
अंतर्गळ. संप्राप्ति व लक्षण—भार वाहणे इत्यादि श्रमांनी प्रकुपित वायु स्थूलांत्र लघ्वंत्राचा एखादा भाग किंवा क्षुद्रांत्राला विकृत करून खाली जांघेच्या सांध्यात जाऊन गाठीसारखी सूज करतो; त्याचे उपचार न केले तर तो भाग वृषणात शिरून वृषणाची वाढ करतो ते वृषण फुगले की बस्तीप्रमाणे ताणले जाते, मोठे होते. दाबले की शब्द करीत वर जाते, दाब काढला की पुन्हां ते मोठे होते.

**अन्त्रवृद्धिर्द्विविधा—यदा तु स्वनिवेशादधोगतमन्त्रं फलकोशं प्रविश्य मुष्कवृद्धिं करोति तदा सा 'कोशप्राप्ता' इति कथ्यते** ( सुचि. १९.२२ ) **यदा तु स्वनिवेशादधोगतमन्त्रं फलकोशमप्राप्तमन्तरैव तिष्ठति तदा 'अप्राप्तफलकोशा' इति कथ्यते**
( सुचि. १९.२१ )
अंतर्गळ दोन प्रकारचा—अंडकोशात उतरलेला. अंडकोशात न उतरलेला. पहिल्या प्रकारात आतडे आपल्या ठिकाणाहून खाली अंडकोशात शिरून अंडवृद्धि होते; दुसऱ्या प्रकारात अंडकोशात न उतरता मध्यंतरीच राहते.

**—संमूर्च्छन**—न., **रोगलक्षण०, अन्त्रपरिवर्तनम्, बद्धगुदोदरस्य हेतुष्वेकः** ( चचि. १३.३९ )
आतडीत आतडी घुसणे. बद्धगुदोदराचे एक कारण.

**—स्फुटन**—न., **रोगलक्षण०, अंत्रे स्फुटनवद्वेदना** (चचि. १३.१४) आतड्यात फुटल्याप्रमाणे वेदना.

**अन्त्राद**—पु., **कृमि०, असौ कफजोऽन्त्राण्यत्तीत्यन्त्रादः**
( चसू. १९.४ ) ( ९ )
कफ दोषाने झालेले आतडी खाणारे कृमि.

**अन्त्रालजी**—स्त्री., **क्षुद्ररोग०, कफवातजा घनाऽवक्रोन्नता परिमण्डलाऽल्पपूया पिटिका**
या नांवाची पुळी. कफवातापासून घट्ट सरळ गोल उचलून आलेली थोडा पू असलेली अशी पुळी.

**अन्ध**—वि., **दृष्टिहीनः** ( सुशा. २.२५ ) आंधळा.

**—कारी**—स्त्री., **पारददोष०, कृष्णत्वकरः कञ्चुकाख्यो दोषः** ( र., ११.२२ ) पाऱ्यातील एक दोष. त्वचा काळी करणारा कंचुकी नावाचा दोष.

**—पूतना**—स्त्री. **रोग०, बालानां ग्रहरोगेष्वेकः, तल्लक्षणम्—एतज्जुष्टोऽर्भकः स्तनद्वेषातिसारकासहिक्काच्छर्दि—ज्वरादिभिः पीड्यमानो दुष्टवर्णतनुरधोमुखशयानो काञ्जिकाद्यम्लगन्धिकश्च भवति** ( सुउ. २७.१३ ) **दृष्टिसादोऽक्षिरुक्कण्डूः पोथकीजन्म शूनता स्वरक्षीणता वेपथुर्मत्स्यगन्धित्वं च भवति** ( असंउ. ३ ) **स्त्रीविग्रहवान्ग्रहः, तच्चिकित्सा—**

**' अक्षिरोगचिकित्साभिः शमयेदन्धपूतनाम् '**
( का. बालग्रहचिकित्सा )
मुलांचा एक ग्रहरोग. लक्षण–स्तनाचा तिटकारा, अतिसार, खोकला, ओकारी, ज्वर इत्यादींनी पीडलेले, वर्ण व शरीर बिघडून खाली तोंड करून निजणारे व कांजी इत्यादिकांप्रमाणे अंगाचा आंबट वास येणारे मूल असून दृष्टी कमी, वेदना, खाज खुपऱ्यांची सूज, स्वर क्षीण, कंप, माशासारखी घाण. यावर झोळ्याचे उपचार करावे.

**–पूतनाप्रतिषेध**–पु. अध्याय० ( सुउ. ३३. )
अध्यायाचे नांव

**–मूषा**–स्त्री., यन्त्र०, मूषाभेदः, **मूका मूषा, संपुटिता मूषा** ( र. २.१३७ ) झांकण घालून मातकापड किंवा योग्य त्या औषधांनी संधिलेप केलेली मूस.

**–यन्त्र**–न., **अन्धमूषा** ( र. ५.४३ ) पहा–'अंधमूषा'.

**–वडवाग्नि**–पु., यन्त्र० यद् गन्धकादिजारणार्थ-मुपयुज्यते ( र. २७.७८ )
पाऱ्यात गंधक इ. जिरवण्याकरिता उपयुक्त यंत्र–मूस.

**अन्धालजी**–स्त्री. क्षुद्ररोग०, **दुष्टौ श्लेष्मानिलौ स्नायुश्रिता अवक्त्रामल्पपूयामकण्डुरामामोदुम्बरसंकाशां परि-मण्डलामन्तर्मुखीं पिडिकां** जनयतः, साऽन्धालजी ( सुनि. १३.६ ); **'अलजी'. नाम्ना वाग्भटे, आन्त्रालजी–नाम्ना माधवनिदानेऽस्य निर्देशः ।**
' अंत्रालजी ' पहा
दुष्ट कफवातामुळे स्नायूमध्ये तोंड नसलेली, थोड्या पुवाची, खाजेची, कच्च्या उंबराच्या रंगाची भोवती कडा असलेली व आत तोंड असलेली पुळी होते ती.

**अन्धाहिक**–पु., सर्प० **जलबिलशायीति प्रसिद्धस्तस्य दंशोऽन्धत्वकरः** ( सुक. ४.३८ )
**निर्विषसर्प०**,–( सुक. ४.३४ ) ( ४ )
ज्याच्या डसण्याने मनुष्य आंधळा होतो असा सर्प. निर्विष सर्प.

**अन्ध्रण**–न., **बन्धनम्** ( र. १०.५. ) बंधन.

**अन्न**–न., **अद्यते इत्यन्नम्** ( सुक. १.१ )
अन्न. खाण्याचे पदार्थ. खाणे.
**आहारः** ( सुसू. ४६.४६४ ) खाद्य पदार्थ.
**ओदनम्** ( सुउ. ३९.३१८ ) भात.
**अन्नपानम्** ( सुउ. ६४.५ ) खाद्य पेय.
**" अन्नं वृत्तिकराणां श्रेष्ठम् "** ( चसू. २५.४० )
जगविणाऱ्या सर्व द्रव्यात अन्न हे श्रेष्ठ आहे.

**–काल**–पु. **अन्नग्रहणयोग्यः कालः** ( चचि. १९.२३ ) ( अहसू. १८.२९ ) जेवणाची योग्य वेळ.

**–क्लम**–पु. **भोजनजनितः श्रमः** ( सुसू. ४६.४८७ )
जेवणाने आलेला थकवा. जेवण अंगावर येणे. जेवणाने आलेली ग्लानि.

**–गति**–स्त्री., **अन्नगमनमार्गः, अन्नवहस्रोतः** ( सुनि. १६.५३ )
शरिरातील अन्नाचा संचारमार्ग, पचनमार्ग.

**–गृद्धि**–स्त्री., **रोगलक्षण०, अन्नाभिलाषा** ( चसि. २.१८ ) अन्नाची इच्छा.

**–जा**–वि., **हिक्काभेदः** ( सुउ. ५०.१० ) **भक्तोद्भवे-त्यस्य पर्यायः** (अहनि. ४.१९) **त्वरयाऽयुक्तिसेवितैः रूक्षतीक्ष्णासात्म्यान्नपानैर्या भवति, सात्म्यान्नपानेन च या शमं याति सा** ( अहनि. ४.१९–२१ )
उचकीचा एक प्रकार. जेवताना लागणारी उचकी. त्वरेने, अव्यवस्थित, रूक्ष, तीक्ष्ण, असात्म्य, अन्न-पानाने ही होते व सात्म्य अन्नपानाने शमते.

**–जात**–न., **आहार्याणि द्रव्याणि** ( चनि. २.४ )
सर्वप्रकारचे अन्न. अन्न म्हणून ज्याचा उपयोग होऊ शकतो ते सर्व.

**–त्रिक**–न., **त्रिविधमन्नम्** वातपित्तकफकरमिति ( चचि. २४.६९ )
अन्नत्रय, वातकर. पित्तकर, व कफकर अशी अन्नत्रयी.

**–द्विष्**–वि., **अन्नं द्वेष्टीति अन्नद्विट्** ( चसू. १३.५५ )
अन्नाचा द्वेष–कंटाळा ज्याला आहे तो. अन्नशत्रु. अन्न नको नको वाटणारा. अन्नाचा वीट आलेला.

**–द्वेष**–पु. **रोगलक्षण० अन्नस्य द्वेषः, पित्तज्वर-लक्षणेषु एकम्** ( चनि. १.२४ )
अन्नाचा द्वेष—कंटाळा--वीट. अन्न नकोसे वाटणे.

**–पक्तृ**–पु. जाठराग्निः (चचि. १५.३८.)
पाचकाग्नि.

**–परिवर्त**–पु. **अन्नस्य परिवर्तः देशादिहेतुकोऽन्न-विनिमयः** ( चनि. १.२८. )
देश, ऋतुकाल इ. ना अनुसरून अन्नात केलेला बदल.
**सहसैवाक्रमेण कृतान्नाभ्यासः** ( अहनि. १.२१ )
क्रम सोडून एकदम केलेला अन्नाचा बदल.

**–परिवर्तन**–न. **असात्म्यभोजनम्, क्रीतान्नभोजनम्** ( अहनि. १.२१ )
शरिराला सात्म्य न होणारे जेवण. विकत आणलेले जेवण–अन्न.

**–पान**–( न. ) **आहारः, अन्नपानं च** ( असंसू. १०.७५ ) अन्नपान, खाद्यपेय, आहार.

**–पानक्रम**–पु., **आहारविधानम्** ( चचि. ३.१९६ )
अन्नपान कसे घेतले पाहिजे याबद्दलचा विधि. भोजनाचे शास्त्र.

**–पानरक्षाकल्प**–पु., **अध्याय०** ( सुक. १.१ )
खाद्यपेय पदार्थांचे रक्षण कसे करावे हे सांगणारा अध्याय.

**–पानरस**–पु., **अन्नपानस्य सारः सर्वधातूनां पोषकः स्थायी रसः,** ( सुसू. १४.११ )
पचनानंतर तयार झालेले शरीर घटक. पोषक अन्नपानातील पोषक अंश. रस धातु.

**–पानविधि**–पु., **अध्याय०** ( सुसू. ४६.१ )
पहा 'अन्नपानक्रम.'

**–प्रवेश**–पु., **मुखद्वारा अन्नस्य कोष्ठे प्रापणम्** ( अहृसू. १२.५ )
अन्न तोंडाने घशातून जठरात येऊन पोहोचणे.

**–प्राशन**–न., **संस्कार० बालेभ्यः प्रथमतः अन्नप्रदानम्** ( असंउ. १ ) **तच्च षष्ठे मासि कुर्यात्,** ( सुशा. १०.४९ ) **जातदन्तस्य दशमे मासि कारयेत्** ( काखिल. १२.१५–५८ )
तान्ह्या मुलांना प्रथमच अन्न देणे-लावणे. उष्टावण. सहाव्या महिन्यात किंवा दात आल्यानंतर दहाव्या महिन्यात उष्टावण करावे.

**–मद**–पु., **रोगलक्षण० अन्नेन भुक्तेन हर्षक्षयः** ( सुक. २.३० ) खाल्लेल्या अन्नाने झालेला आनंदनाश.

**–मय**–वि., **अन्नेन युक्तः, 'देहेऽन्नमयाः सर्वे भावाः'** ( असंशा. ६ ) अन्नमय. शरीरांतार्गत सर्व (भाव) घटक अन्नाचे आहेत. अन्नमय आहेत.

**–रक्षा**–स्त्री., **अध्याय०** ( अहृसू. ७ )
अन्नाचे रक्षण. अध्यायाचे नाव.

**–रस**–पु., **भक्तमण्डः** ( असंशा. ६ )
**निःशेषपरिपक्वस्य अन्नस्य रसः** ( सुचि. ३७.४८ )
भाताची अतिपातळ पेज. शिजलेल्या भाताची शिते नसलेली पेज.

**–रसखेद** पु., **रोगलक्षण०, अन्नरसे खेदः, अवसादः, सर्वरसेषु अनिच्छा** ( चनि. १.२१ ) कोणत्याही रसाचे अन्न नकोसे वाटणे. षड्रसांची अनिच्छा.

**–वहस्रोतस्**–न., **शारीर० अन्नवहमार्गः** ( असंशा. ६ ) **तस्य मूलम्–आमाशयः वामं च पार्श्वम्** ( चवि. ५.८ ) **आमाशयः अन्नवाहिन्यश्च ( धमन्यः )** ( सुशा. ९.१२ ) **दुष्टिलक्षणानि–अनन्नाभिलषणम् अरोचकाविपाकौ छर्दिश्च** ( चवि. ५.८ ) **दुष्टिकारणानि–अतिमात्रस्य अकाले अहितस्य च भोजनात् पावकस्य च वैगुण्यात् अन्नवाहीनि स्रोतांसि दुष्यन्ति** ( चवि. ५.१२ ) **विद्धलक्षणानि–आध्मानं, शूलान्नद्वेषौ, छर्दिः, पिपासा, आन्ध्यं, मरणं च ।** ( सुशा. ९.१२ )
शरिरातला अन्नवहनमार्ग. पचनमार्ग. आमाशय ते पक्वाशय अखेरपर्यंतचा मार्ग. त्याचे मूळ आमाशय व डावी बाजू. आमाशय व अन्नवाही धमन्या. दुष्टिलक्षणे–अन्नाची अनिच्छा, अरुचि, अपचन व ओकारी. कारणे–अतिप्रमाणात, अकाली, अहितकर जेवण व अग्नीचे वैगुण्य यांनी अन्नवह स्रोतसे दुष्ट होतात. ती छेदली गेली तर लक्षणे–पोट फुगणे, शूल, अन्नाचा तिटकारा, ओकारी, तहान, आंधळेपणा व मरण.

**–वहनाडी**–स्त्री., **अन्नवहस्रोतः** ( र. १३.४८ )
अन्नवह स्रोतस.

**–वाहिनी**–धमनी स्त्री., **शारीर० सा च अन्नवहस्रोतसोः मूलम् " अन्नवहे द्वे तयोर्मूलम् आमाशयोऽन्नवाहिन्यश्च धमन्यः** ( सुशा. ९.१२ )
अन्नवहन करणारी प्रेरक धमनी. ती अन्नवहस्रोतसांचे मूळ आहे. अन्नवह स्रोतसे दोन. त्यांचे आमाशय व अन्नवाही धमन्या मूळ आहे.

**–विष**–न., **अजीर्णविषमाशनादिकारणैर्दुष्टेनाग्निनाऽपच्यमानं शुक्तत्वं प्राप्तं विषवत् परिणामकरमन्नम्** ( चचि. १५.४६ ) अजीर्ण विषमाशनादि कारणांनी अग्नि दुष्ट होऊन न पचलेले व आंबट झालेले. विषासारखा परिणाम करणारे अन्न.

**–वीर्य**–न., **अन्नप्रभावः** ( अहृसू. १२.१५ ) अन्नाचा प्रभाव, वीर्य.

**–शल्य**–न., **शल्यभूतमन्नम्** ( सुसू. २७.५ )
अन्नरूपी शल्य.

**–श्रद्धा**–स्त्री., **भक्ताकाङ्क्षा** ( सुउ. ६४.८४ )
जेवणाची इच्छा.

**–संयोग**–पु., **अन्नोपयोगः** ( अहृसू. २९.१५ )
अन्नाचा उपयोग.

**अन्नाद**–वि. **अन्नमत्तीति अन्नादः, केवलान्नभक्षको बालस्तृतीयादिसंवत्सरादूर्ध्वं भवति** ( सुसू. ३५.२९ )
केवळ अन्न खाणारे मूल-तिसऱ्या वर्षापासून ते केवळ अन्न खाणारे होते.

**अन्नादि**–पु., **अन्नस्य भक्तस्य आदिः आरम्भः** ( अहृसू. १३.३७–३८ )

**यस्मिन् भुक्ते पश्चात् तत्कालमेव भुक्तं भुज्यते। तदपानाख्ये वायौ विगुणे सति दीयते। सुखपरिणामकरत्वादग्लानिकरत्वाच्च वृद्धशिशुभीरुकृशाङ्गनासु तत् प्रशस्तं भवति। प्रागभक्तं, भक्तादौ इत्यस्य पर्यायौ।** ( सुउ. ६४.६९ )
औषध घेण्याचा काळ. औषध घेतल्यानंतर लगेच जेवण घेण्याने औषध घेण्याचा निर्माण केलेला काल. जेवणाचा आरंभकाल. अपानवायूच्या विकृतीवर हा औषधकाल चांगला. अन्न सुखाने पचते. ग्लानि येत नाही, म्हातारे, बालक, भित्रे, कृश यांना उत्तम. प्रागभक्त, भक्तादि हे याचे पर्याय. पहा—अन्नादि.

**अन्नानुपान** न., **अन्नस्य अनुपानम्** ( चसू. २७.३१९ )
जेवणानंतरचे पेय.

**अन्नावग्रह**—वि., **अन्नेन अवग्रहः सहसोर्ध्वकायप्रतिबन्धोऽवष्टम्भो यस्येति अन्नावग्रहम्, अन्नमध्यप्रयुक्तम् अन्नात् पूर्वं वा, "काठिन्याद्यः पुरीषं तु कृच्छ्रान्मुञ्चति मानवः। स घृतं लवणैर्युक्तं नरोऽन्नावग्रहं पिबेत्** ( चचि. १५.२०५ ) ( अहचि. १०.७२ अरुण ) ( असंचि. १२ )
औषधाचे कार्य ऊर्ध्व भागावर होण्याला प्रतिबंध करण्याकरिता औषध घेतल्यावर अन्न घेणे. जेवणाचे आरंभी किंवा मध्ये औषध घेणे. मळ कठीण झाल्यामुळे जेव्हां विसर्जनास त्रास होतो तेव्हां सैंधव घालून गरम तूप या काळी घ्यावे.

**अन्नाश्रद्धा**—स्त्री., **रोग० अन्नविद्वेषः रसदोषजविकारेषु एकः** ( सुसू. २४.९ )
अन्नावर अनिच्छा--इच्छा न होणे. अन्नद्वेष.

**—अन्य**—न., **अपरम्** ( सुचि. १४.८ ) दुसरे.

**—धान्य**—न., **विजातीय—धान्यम्** ( अहसू., ६.१४१ )
दुसरे--दुसऱ्या जातीचे धान्य.

**—परिवार**—वि., **अन्यव्याधिपरिवाराः** ( असंसू.२१ ) **परतन्त्ररूपाः** जो रोग असताना दुसऱ्या रोगाचा परिवार व्यक्त झालेला असतो तो. परतंत्र व्याधीने युक्त मुख्य व्याधि.

**—प्रकृति**—वि., **विजातीयप्रकृतिः** ( चशा. ६.११ )
दुसऱ्या जातीची प्रकृति.

**—भाव**—( परिव. ) पु., **स्वरूपाच्च्युतस्य विपरीतगुणावाप्तिः, यथा कृष्णानां शुक्लता** ( सुसू. ३२.३ ) **मरणम्** ( सुचि. १४.८ )
मूळ गुण जाऊन त्यांच्या उलट गुण येणे. काळा रंग जाऊन पांढरा रंग येणे. मरण.



**—योनि**—स्त्री., **असवर्णा** ( चसू. ८.२२ )
दुसऱ्या वर्णाची, जातीची.
**अजामहिष्यादिः** (अहसू. ७.७०) शेळी, म्हैस इ०
**विपरीत—कारणम्** ( सुसू. ४२.८ )
दुसरे कारण, उलट कारण.

**—लक्षण**—वि., **यः भविष्यद्व्याधिख्यापकः पूर्वरूपसंज्ञकः** ( सुसू. ३५.१८ )
पुढे होणाऱ्या रोगाचे दर्शक, पूर्वरूप.

**—शास्त्र**—न., **आयुर्वेदेतराणि व्याकरणसांख्यज्योतिःशास्त्रादीनि; कायचिकित्सादीनि इत्यन्ये।** ( सुसू.४.६ )
आयुर्वेदेतर शास्त्रे व्याकरण, सांख्य, ज्योतिष इ० होत. अन्य म्हणजे कायचिकित्सा शास्त्राला शल्यशास्त्र, शल्यशास्त्राला कायचिकित्सा, काय व शल्यशास्त्राला ऊर्ध्वांगचिकित्सा अशी ही परस्परांना अन्य शास्त्रे होत असे एकमत.

**अन्यतरनिष्ठा**—स्त्री., **अन्यतररूपाऽवस्था**
( चवि. ८.१३४ ) कोणता तरी एक पक्ष स्वीकारणे.

**अन्यतस्**—अव्य., **पृष्ठतः** ( सुउ. ६.२७ ) पाठीमागे.

**( अन्यतो ) वात**—पु., **नेत्ररोग०, योऽवटुकर्णशिरोहनुस्थो मन्यागतो वा अन्यतो गतो वा वातः भ्रुवि लोचने वा रुजां करोति, सोऽन्यतोवातः। अन्यतः स्थितः वायुः अन्यतो वेदनां करोति इत्यतः अन्यतोवातः** ( सुउ., ६.२७; ) **वायुः मन्याक्षिशङ्खतः अन्यतो वा तीव्रां व्यथां करोति, नेत्रञ्च पैच्छिल्यरागशोफादिरहितं पर्यश्रुसङ्कुचितं विदधाति।** ( असंउ १८ )
डोळ्याचा एक रोग. मानेचा मागचा भाग. कान डोके हनुवटी मान किंवा इतरत्र असलेला वायु डोळे, मान, कानशीळ, अथवा इतरत्रही तीव्र पीडा करतो; आणि डोळ्यांना बुळबुळितपणा, लाली, सूज इ० होत नाही व अश्रूंचाही संकोच होतो.

**अन्यथा**—अ., **प्रकारान्तरेण, अतथात्वे वा** ( चचि. ३.६५ ) ( चशा. ८.५५ )
निराळ्या प्रकाराने किंवा अवास्तवतेने.

**—काम**—पु., **अगम्यागमनम्** ( अहसू. २.२१ )
अगम्य—निषिद्ध स्त्रीशी संभोग.

**—कार**—वि., **भिन्नरूपम्** (अहसू.१२.६९) निराळे रूप

**—क्रिया**—स्त्री., **अन्यथाकरणम्, संस्काराधानम्** ( चसू. १६.३३ ) निराळे करणे, संस्कार करणे.

**–चर**–वि., **विमार्गगः** ( सुउ. २०.६ )
मार्ग सोडलेला, अन्य मार्गात गेलेला.

**–दर्शिन्**–वि., **अन्यप्रकारदर्शी** ( सुसू. २.७ )
चुकीचे शिकविणारा.

**–भाव**–पु., **विपरिणामः, स्वरूपाचलनम्** ( सुशा. ४.७८ )
मुळात बदल. निराळा भाव, स्वतःच्या रूपात बदल.

**अन्या**–स्त्री., **वनस्पति०, हरीतकी** ( र. २२.८१ )
हिरडा.

**अन्यादोडी**–स्त्री., **वनस्पति०, जीवन्तीभेदः**
**तद्गुणाः–कटु, तिक्ता, उष्णा, दीपनी, रुच्या, कफवातघ्नी, कण्ठामयरक्तपित्तदाहघ्नी च ।**
**"अन्यादोडी तु जीवन्ती शाकश्रेष्ठा सुखालुका । बहुपर्णी दीर्घपत्रा सूक्ष्मपत्रा च जीवनी"** ( रा. परि. ४.४१–४२ )
हरिणदोडीचा एक प्रकार. गुण–तिखट, कडु, उष्ण, दीपक, रुचकर, कफवातघ्न, घशाचा रोग, रक्तपित्त, दाहनाशक, ही भाज्यांत श्रेष्ठ. सूक्ष्म पण लांब आणि पुष्कळ पानांची भाजी.
दोडीच्या दुसऱ्या जातीचे जीवंती, शाकश्रेष्ठा, सुखालुका, बहुपर्णी, दीर्घपत्रा, सूक्ष्मपत्रा आणि जीवंती हे पर्यायशब्द आहेत.

**अन्यान्यता**–स्त्री., **भेदः** ( चशा. १.४९ ) भेद.

**अन्येद्यु**–पु., **रोग०, अन्येद्युष्कः** ( चचि. ३.३४ )
पाळीच्या ज्वराचा एक प्रकार, एका दिवसात एकदा येतो तो ताप.

**अन्येद्युष्क**–पु., **रोग०, विषमज्वरभेदः, अहोरात्रे यः एककालं प्रवर्तते** ( चशा. १.११३ ) ( सुउ. ३९.७० ) ( चचि. ३.३५३ )
दिवस रात्रीतून एकदा येणारा ज्वर. पहा. 'अन्येद्यु'

**अन्योन्य**–वि., **परस्परम्** ( सुशा. १.२१ ) ( चशा. १.३७ ) परस्पर, एकमेक.

**–मूर्च्छन**–न., **परस्परमिश्रीभावः** ( अहृसू. १३.२६ ) परस्परात मिसळणे.

**अन्योन्यानुप्रविष्ट**–वि., **परस्परानुप्रविष्टम् । आकाशवायुतेजजलपृथ्वीनां परस्परानुप्रवेशेन पाञ्चभौतिकद्रव्यनिष्पत्तिः, एवं तानि अन्योन्यानुप्रविष्टानि ।** ( सुशा. १.२१ ) आकाशादिभूते एकमेकात प्रविष्ट होऊन पांचभौतिक द्रव्यांची निर्मिति होते. एकमेकात प्रविष्ट होणे.

**अन्योन्यावरण**–न., **परस्परावरणम्, यथा एकदोषेण अन्यदोषस्य मार्गावरोधः** ( चचि. २८.१९९ )
एका दोषाने दुसऱ्या दोषाचा मार्ग रुद्ध करणे.

**अन्वक्षम्**–अ., **तत्क्षणमेव, न क्षणान्तरे; अक्षस्य यन्त्रस्य अनु–पश्चात् अन्वक्षम्** ( सुशा. ३.४ ) ( सुचि. ३७.६४ )
त्याच क्षणी, दुसऱ्या क्षणी नाही. यंत्राच्या मागे.

**अन्वय**–पु., **अनुबन्धः, संबन्धः** ( चनि. ८.१८ ) संबंध.
**संभूतिः** ( चचि. ३.१७६–१७७ ) जन्म, कारण.
**कुलं, वंशो वा** ( सुसू. २.३ ) कुल, वंश.

**अन्वास**–पु., **अनुवासनम्** ( असंसू. २९ ) स्नेहबस्ति.

**अन्वासन**–न., **अनुवासनम्** ( अहृसू. १९.२ ) स्नेहबस्ति.

**अप्**–स्त्री., **महाभूत०, जलम्** ( चसू. ८.९ ) पाणी.
**इदं सत्त्वतमोबहुलम् ।** ( सुशा. १.२० )
हे सत्व व तम गुणाधिक होय.
**देवता०, रसनस्य अधिदैवतम् आपः ।** ( सुशा. १.७ )
जलदेवता. ( रसनेंद्रियाची. )

**–चर**–पु., **जलचरः** ( अहृसू. ६.५० )
पाण्यांत संचार करणारे.

**–पान**–न., **जलपानम्** ( अहृसू. २८.३९ ) पाणी पिणे.

**–( अब् )–धातु**–पु., **कायद्रवः श्लेष्मपित्तरसादिकः** ( सुउ. ४०.६ )
शरिरातील जल धातु. पित्त, कफ, रस इत्यादि.
**स्वेदः** ( सुउ. ३९.२४ ) घाम.
**शरीरधातुगतः उदकभागः** ( चचि. २२.१९ )
शारीर धातूंतील द्रवांश.

**अपकर्षण**–न., **तन्त्रयुक्ति०, पृथक्करणम्, अपवादेन कथनम् ।** ( सुउ. ६५.१८ )
पृथक्करण. अपवादाच्या आधाराने विधान करणे.
**ह्रासः** ( सुचि., ६.१७ ) क्षय, नाश.
**दुर्बलीभवनम्** ( सुउ. ६२.६ ) दुर्बळ होणे.
**ऊर्ध्वगतस्याधःकर्षणम्** ( सुचि., १५.३ )
ऊर्ध्वगत दोषादिकांना खाली आणणे, अधोमार्गाने बाहेर आणणे.
**चिकित्सोपक्रमः, निर्हरणम् । तच्च द्विविधम् बाह्यान्तर–भेदेन। तत्र बाह्यमपकर्षणं ग्रन्थ्यर्बुदोपपक्ष्मकृमिशल्यादिषु शस्त्रहस्तयन्त्रादिभिः । अभ्यन्तरं पुनर्वमनविरेचनादिभिः ।** ( असंसू. १२.६ )
चिकित्सेचा एक उपक्रम. मलनिर्हरण-ते दोन प्रकारचे–बाह्य व अंतर्गत. शस्त्रादिकांनी ग्रंथ्यादिकातील बाह्य व वमन विरेचनादिकांनी अंतर्गत दोष बाहेर काढले जातात.

**अपक्ति**–स्त्री., **रोग०, विंशतिश्लेष्मविकारेषु एकः** ( चसू. २०.१७ ) ( अहृसू. १२.५३ )
अपचन, वीस कफविकारांपैकी एक.

**अपक्षेपण**–न., **अङ्गस्याऽधोनयनम्** ( अहृसू. १२.७ )
शरीरावयव खाली नेणे.

**अपगम**–पु., **निर्गमनम्** ( असंनि. २ )
बाहेर काढणे. निघणे, निघून जाणे.

**अपगमन**–न., **देहान्तरगमनम्** ( चशा. ३.१३ )
निराळ्या देहात जाणे.

**अपचय**–पु., **रोगलक्षण०, कृशत्वम्** ( सुसू. १०.५ )
क्षय. शरिराचा कृशपणा. किडकिडितपणा.

**अपचार**–पु., **अपथ्याचरणम्** ( चचि. ३.२५ )
अपथ्य आहारादिकांचे सेवन.
**दुष्टाहाराचारौ** ( सुसू. २४.५ ) ( सुउ. २७.६ )
दोष दुष्टि करणारा आहारविहार–वागणूक.

**अपचारिन्**–वि., **अयथार्थकारी** ( सुचि. ५.४ )
अयोग्य कार्य करणारा, अयोग्य मार्गाने चालणारा.

**अपचित**–वि., **नष्टम्, अप्राप्तम्** ( सुउ. ५७.१६ )
नाहीसे झालेले. न मिळालेले

**अपचिति**–स्त्री., **पूजा** ( चनि., ७.२३ )
पूजा ( देव इत्यादिकांची. )

**अपची**–स्त्री., **रोग० बहिर्मार्गजः** ( चसू. ११.४९ असंउ. ३४ ) बाह्यमार्गात उत्पन्न झालेला विकार.
**अयं ग्रन्थिरूपः व्याधिः चिरकारी च ।**
( सुनि. ११.११, )
हा दीर्घकाल रहाणारा रोग. जुनाट गण्डमाळा. हा ग्रंथिस्वरूप व दीर्घकालीन विकार.
**स्थानमस्य रोहिणी नाम त्वक्** ( सुशा. ४.४, ) ( चचि. २८.१३५., ) याचे स्थान रोहिणी त्वचा.
**निरुक्तिः–चयप्रकर्षात् अपची ।**
ज्यांत शरीरदोषाचा अत्यधिक संचय होतो तो रोग.
**संप्राप्तिः–हन्वस्थिकक्षाक्षकबाहुसन्धिमन्यागलेषु उपचितं मेदः कफश्च ग्रन्थिं कुरुतः । लक्षणम्–स्थिरा वृत्ता आयता स्निग्धा अल्परुजा ग्रन्थिर्भवति । आमलकास्थिमात्रैः मत्स्याण्डजालप्रतिमैः अनन्यवर्णैः ग्रन्थिभिः सा उपचीयमाना भवति । ताः कण्डुयुताः प्रभिन्नाः स्रवन्ति, नश्यन्ति, भवन्ति च अन्याः । अयं रोगः सुदुस्तरः ।** ( सुनि. ११.१० ) **अस्य 'गण्डमाला' इत्यपरं नाम** ( असंउ. ३४. ) **अस्मिन् शस्त्रकर्मापि क्रियते ।** ( सुचि. १८.२७. )
संप्राप्ति–हनुवटीचे हाडाचा संधी, काख, गळसरीचे धनुष्यासारखे हाड, व बाहु यांचे सांधे, मान व गळा यांत संचित मेद व कफ दोष गाठ उत्पन्न करतात. **लक्षण**–स्थिर, वाटोळ्या, पसरट, स्निग्ध थोड्या वेदनायुक्त गांठी होतात. आवळयाच्या अठळी एवढ्या, माशांच्या अंड्याच्या जाळ्यासारख्या, त्वचेच्या रंगाच्या असतात; त्यांना खाज असते, फुटल्यानंतर त्यांतून स्राव होतो; त्या नाहीशा होतात; व पुन्हा दुसऱ्या होतात. हा रोग फार कठीण असतो. याला गंडमाळा असे नाव आहे. यात शस्त्रकर्मही करतात.

**अपतंसन**–न., **रोगलक्षण०, पतनम्**
( चचि. २८.१८ ) पडणे.
**अपतन्त्रक**–( पु., ) **वातरोग०** ( सुनि. १.६६; )
**संप्राप्तिलक्षणे–अधःप्रतिहतो वातः कफान्वितः सन्नूर्ध्वं व्रजन् हृदाश्रिता नाडीः प्रविश्य हृदयं शिरः शङ्खौ च पीडयन् गात्रं परितः आक्षिपेत्, धनुर्वच्च नामयेत्, तदा कृच्छ्रादुच्छ्वसिति, कपोत इव कूजति, स्तब्धस्रस्तमीलितदृक् निःसंज्ञश्च भवति ।** ( चसि. २.२२ ) ( चसि. ९.१२–१४ असंनि. १५. ) एक वातरोग. आंचके आणि बेशुद्धि यांत प्राधान्याने ही असतात. वाताच्या खाली जाण्याच्या गतीला अडथळा झाला तर तो कफयुक्त होऊन वर येऊन हृदयाच्या नाड्यात शिरून हृदय, शिर, शंख यांना पीडित करून हातपाय भोंवताली आपटतो, धनुष्यासारखा वाकवतो, तेव्हां तो रोगी कष्टाने श्वास घेतो, पारव्यासारखा आवाज करतो, डोळे मिटलेले, दडस, गळालेले असतात. त्याला शुद्धि नसते.

**अपतर्पण**–( न., ) **लङ्घनम्, अनशनादि**
( चवि. २.१३ ) लंघन. आहार वर्ज्य करणे इत्यादि.
**तत् त्रिप्रकारम्–लङ्घनम्, लङ्घनपाचनम्, दोषावसेचनं च** ( च. ३.४० )
लंघन प्रकार तीन; लंघन, लंघन पाचन व तिसरा प्रकार दोष रेचकादिकांनी बाहेर काढणे.
**चिकित्सोपक्रमः** ( असंसू. २४; अहृसू. १४.१ )
चिकित्सेपैकी एक उपाय.
**कर्शनम्** ( चसू. २३.२९ )
कृशता आणणारे उपचार.
**व्रणस्य षष्ट्युपक्रमेषु एकः** ( सुचि. १.८ )
**ऊर्ध्वमारुततृष्णाक्षुन्मुखशोषश्रमान्वितगर्भिणीवृद्धबालभीरवश्चैतेऽपतर्पणे निषिद्धाः**
( सुचि. १.१२ )

**अपतर्पणद्रव्यं नाम लङ्घनद्रव्यं तच्च अग्निवाय्वाकाशात्मकम्** ( अहसू. १४.३ )
**यथा–कुलत्थादीनि** ( अहसू. २४.२१,२२.३६ )
व्रणाच्या साठ उपायांपैकी एक. ऊर्ध्व–वात, तहान, तोंड सुकणे. भूक, क्षय, श्रम झालेले, गर्भिणी, बाल, भित्रा यांना लंघन देऊ नये. अपतर्पण द्रव्य म्हणजे लंघन द्रव्य. ते अग्नि वायु आकाश महाभूतात्मक असते. जसे कुळीथ इत्यादि.

**अपतर्पित**–वि., **कर्शितः** ( सुचि. २३.४ ) **अपतर्पितस्य रूपाणि–शूलम्, अरतिः, आध्मानम्, गुदप्रकोपः, ज्वरः, अङ्गदाहः, श्रमः, मोहः, तृष्णा, शय्यासनस्त्रीविषयेष्वभक्तिः** ( का. भोजनकल्प. १७.१८ )
कृश करणाऱ्या उपायांनी कृश झालेला. लक्षणे–शूल, बेचैनी, पोटफुगी, गुदाचा क्षोभ, ज्वर, अंगाचा दाह, थकवा, विचार कुंठित होणे, तहान, शय्या, आसन, स्त्रीसंभोग न आवडणे.

**अपतानक**–पु., वातरोग०, ( चसि. २.२२ ) **अयं मध्यममार्गजः** ( चसू. ११.४९ ) **आक्षेपकभेदः** ( सुनि. १.५२ ) **यः आक्षेपकः अन्तराऽन्तरा पातयति, सः अपतानकः, स त्रिविधः दण्डापतानकः अन्तरायामः बहिरायामः च। संप्राप्तिः लक्षणं च–अधःप्रतिहतो वायुः ऊर्ध्वं व्रजन् हृदाश्रिताः नाडीः प्रविश्य हृदयं शिरः शङ्खौ च पीडयन् परितः गात्रमाक्षिपति धनुर्वच्च नामयति, तत्र कृच्छ्रादुच्छ्वासः, स्तब्धस्रस्तमीलितदृक्त्वम्, कपोत इव कूजनम् निःसंज्ञता च । किंच वायुना हृदि मुक्ते स्वास्थ्यं, हृदि चावृते अस्वास्थ्यं ।** ( चचि ९.१४ ) पहा. 'अपतंत्रक' ( असंनि. १५ ) **( अपतान–पाठः )** ( अहनि. १५.१९–२० ) **तस्य रिष्टलक्षणानि–स्रस्ताक्षत्वं भ्रुवि वक्रता स्वेदो वेपथुः प्रलापित्वं खट्वापातित्वं ( खट्वापादकल्पैः हस्तपादैः प्रसृतैः पतनशीलत्वम् ) बहिरायामित्वं च** ( सुचि. ५.१८ ) पहा. 'अपतंत्रक.'
अपतानक–आचके, अवयवांची फेक व ताण. हा वातरोग मध्यम मार्गातील विकार आहे. आक्षेपकाचा प्रकार. जो मधून मधून मनुष्याला पाडतो तो आक्षेपक–अपतानक होय. याचे प्रकार तीन—दंडापतानक ( लाकडासारखा ताठ अवयवाचा ) अंतरायाम ( आतला धनुर्वात ) बहिरायाम ( बाहेरचा धनुर्वात ) संप्राप्ति व लक्षणे–वायूच्या अधोमार्गात अडथळा आल्यास तो वर येतो व हृदयातील नाडीत प्रवेश करून हृदय, डोके, शंख यात पीडा करून आजूबाजूस भोवताली हात पाय, व गात्रे आपटतो–फेकतो व धनुष्यासारखे नमवतो, कष्टाने उच्छ्वास, डोळे जखडलेले, गळालेले व मिटलेले, पारव्या प्रमाणे आवाज करणे व संज्ञा नाश होणे. हृदय वाताने मोकळे केले की विकार मुक्ति व वाताने व्यापले की विकारोत्पत्ति. मरणदर्शक लक्षणे—डोळे गळणे, भुवया वाकड्या होणे, घाम, कंप, बडबड, खाटेवर हातपाय आपटणे, व बाहेरच्या बाजूला ( पाठीकडे ) वाकडे होणे.
**अभिघातनिमित्तः–आघातजन्यः अपतानकः स च असाध्यः** ( सुनि., १.५९ )
आघातजन्य. अपतानक रोग. हा जखमेपासून झालेला असाध्य.
**गर्भपातनिमित्तः–गर्भपतनकारणाज्जातः अपतानकः, स धातुक्षयात्प्रकुपितेन केवलवातेन भवति; सोऽप्यसाध्यः** ( सुनि., १.५९ )
गर्भपात झाल्यावर त्यामुळे झालेला, तो धातुक्षयाने प्रकुपित झालेल्या केवल वाताने होतो तोही असाध्य.
**शोणितातिस्रावजः धातुक्षयात्प्रकुपित; केवलवातजः, सोऽपि असाध्यः** ( सुनि. १.५९ )
रक्ताचा अतिस्राव झाल्यामुळे झालेला. धातुक्षयाने प्रकुपित, केवळ वाताने झालेला असेल तर तोही असाध्य.

**अपत्य**–न., **संततिः** ( सुचि. २६.३९ )
मूल, संतति, अपत्य.
**–जीव**–पु., **वनस्पति०, पुत्रजीवः** ( रा. परिशिष्ट ९.३१ )
पुत्रजीवी वृक्ष, याच्या फुलाच्या माळा पुत्र व्हावा म्हणून घालतात.
**–जीवक**–पु., **वनस्पति०, पुत्रजीवः ।** ( रा. परि. ९.३१ )
पुत्रजीवी वृक्ष. ( 'पहा–पुत्रजीव'. )
**–दा**–स्त्री., **वनस्पति०, पुत्रदा** ( रा. परि. ४ पृ. ३३७ )
पुत्रदात्री ( वृक्ष ).
**–पथ**–पु., **शारीर०, अपत्यमार्गः, कुक्षिस्थः गर्भः येन पथा निष्क्रामति, स गर्भस्य मार्गः ।** ( चशा. ६.२४ ) ( चचि. १४.६ )
गर्भवतीचा गर्भ बाहेर येण्याचा मार्ग. योनिमार्ग.
**योनिः** ( सुनि. ८.३ ) ( असंशा. ४.२९ )
स्त्रीचे गुह्यांग, योनि.

**–मार्ग**–पु., शारीर०, योनिमार्गः ( चचि. ३०.२२३ ) योनिमार्ग. गर्भ बाहेर येण्याचा मार्ग.

**–संतान**–न., अपत्यपरम्परा, पुत्रपौत्रादिवंशसातत्यम् ( चचि १.९ )

पुत्रपरंपरा. पुत्र, नातु, पणतु इ. संततीची परंपरा.

**अपत्रवल्लिका**–स्त्री., वनस्पति०, सौम्या ( रा. परि. ३.३१ )

पानें नसलेली, शाखांना कांडी असलेली वनस्पति.

**अपथ्य**–वि., अहितम् ( अहृसू. २.७ )

शरिराला अहितकर, दोषवर्धक, रोगकर.

**अपदंश**–पु., रोग०, उपदंशः ( असंउ. ३८ )

दुष्ट योनिसंभोगाने उत्पन्न होणारा रोग.

**अपदेश**–पु., तन्त्रयुक्ति०, अनेन कारणेन इति कार्यं प्रति हेतुकथनम्; यथा मधुरः श्लेष्माणमभिवर्धयति, ( सुउ. ६५.१५ ) अपदेशो नाम यत्प्रतिज्ञानार्थसाधनाय हेतुवचनम् । यथा–"वाताजलं जलाद् देशं देशात्कालं विद्यादुष्परिहार्यत्वात् गरीयस्तरम्–" । ( चसि. १२.४२. )

अमक्या कारणाने हे झाले असे कार्याचे कारण सांगणे, सहेतुक विधान करणे; जसे–गोड रस कफाला वाढवितो. एखादा मुद्दा स्वीकारण्याचा हेतु सांगणे. वातापेक्षा जल, जलापेक्षा देश, देशापेक्षा काल, परिहार करण्यास कठीण म्हणून ते बलवत्तर आहेत.

**अपद्वार**–न., अमार्गः ( सुक. १.२२ )

नित्याचा नसलेला मार्ग. बाजूचे दार. आडमार्गाचे दार.

**अपनयन**–न., दूरीकरणम् ( सुचि. ३८.५, ) यथा बालस्य स्तनादपनयनम्, स्तनपानाद् दूरीकरणम्. ( असंउ. ) । दूर करणे, सोडवणे.

आईचे दुधापासून मुलाला सोडविणे.

**अपप्रजाता**–स्त्री. अकाले पतितगर्भा ( सुनि. ९.२६ ) असम्यक् प्रजाता नाम अयथाकालप्रसूता ( सुउ. ३९.२२ )

अकाली प्रसूत झालेली–गर्भ पडलेली स्त्री.

**अपप्रसूता**–स्त्री., असम्यक् प्रसूता ( अहृसू. १६.८ )

नीट प्रसूत न झालेली स्त्री

**अपबाध्यमान**–वि. मर्मपीडाकरम् ( सुसू. २७.१३ )

मर्मांना पीडा देणारे

**अपबाहुक**–पु., रोग०, अवबाहुकः ( असंनि. १५ ) ( सुनि. १.८२ ) ज्यात हात आखडतो तो वातविकार, खांद्याच्या सांध्यातील शिरा स्नायु आखडतात.

**अपमार्जन**–न., मृजा, स्वच्छीकरणम् ( चशा. ८.२७ )

धुणे, स्वच्छ करणे.

शातनम् ( केशनखरोमादेः ) ( सुचि. २४.७३. )

कातरणे ( केस नखे इत्यादि. )

**अपरा**–स्त्री. शारीर०, गर्भिण्या गर्भाशये गर्भस्य पोषणार्थं जातः, गर्भनाभिनाडीसंबद्धः अवयवविशेषः 'अमरा' इति लोके ख्यातः ( चशा. ६.२३, ) गर्भिण्याः आर्तवं गर्भेण अधः प्रतिहतम् अपरं अपरं चोपचीयमानम् 'अपरा' इत्याहुः । ( असंशा. २, ) ( सुशा. ४.४, ) गर्भावरणं जरायुसंज्ञम् । ( सुचि. १५.१७. ) गर्भावरणविशेषः ।

गर्भाची नाळ व गर्भिणीचा गर्भाशय यांच्यामध्ये गर्भाशयाला संलग्न गर्भपोषणाकरिता झालेला अवयव; वार, गर्भिणीचे रज गर्भाने अवरुद्ध झाल्याने ते वर वर ( अपर ) येऊन वाढते त्याचा बनणारा अवयव अपरा होय.

'उल्ब' इति लोके ( सुचि. ३७.१२५ ) अपतिता अपरा आनाहाध्मानौ कुरुते । ( सुशा. १०.२१ )

गर्भावरचे आवरण; ( गर्भाची पिशवी ) वार. वार पडली नाही तर पोट फुगते वायु ही वाढतो.

**–मुख**–न., जरायुमुखम् ( काशा. जातिसूत्रीय पृ. ५७ ) गर्भावरणाचें तोंड.

**अपराजित**–पु., सविषकीट०, कणभः । ( सुक. ८.२६ )

योग०, ग्रह–कृत–मानसोन्मादादिविकारघ्नः ( सुउ. ६०.४७ )

एक विषारी किडा. ग्रहपीडेने झालेल्या उन्माद इत्यादि मानसविकारांचा नाशक एक योग.

**अपराजिता**–स्त्री., वर्ति०, तिमिरकुकूणकादिनेत्रामयघ्नी ( असंउ. १९ ) या नावाची कांडी डोळ्याचे रोग नाहीसे करणारी आहे.

वनस्पति०, विष्णुक्रान्ता, शमी, हपुषा, गिरिकर्णी, शेफालिः ( निर्गुण्डीभेदः ) ( ध. ५.१७३ ) ( रा. ८.१५५ ) विष्णुक्रांता. शमी, शेरणी, पांढरी गोकर्णी, एक प्रकारची निर्गुंडी.

**अपरान्त**–पु., देश०, कोङ्कणः ( अहृसू. ५.११ )

कोंकण.

**अपराह्ण**–पु., दिनभाग०, दिनस्य तृतीयः प्रहरः ( सुशा. २.२८ )

**पञ्चधा विभक्तेऽहनि चतुर्थो भागः, द्विधा विभक्तेऽहनि द्वितीयो भागः** ( सुचि. २८.३ )
दिवसाचा तिसरा प्रहर. दिवसाचे पाच भाग केले तर चवथा भाग. दोन भाग केले तर दुसरा भाग.

**अपरिज्ञान**–न., **वादे निग्रहस्थान०** ( चवि. ८.३५ )
**( अविज्ञातार्थम् इति न्यायसू०** ( ५.२.९ )
अर्थवादात अडवणुकीचे स्थान माहित नसणे. विषय पूर्ण न येणे.

**अपरिनिष्ठित**–वि., **अनुभवहीनः** ( सुसू. ३.४८ )
( असंसू. २.१० ) अननुभवी, अनुभव नसलेला.

**अपरिपक्व**–वि., **आमम्** ( सुनि. ६.४ ) कच्चा

**अपरिम्लान**–पु., **वनस्पति०, कुर( रु )बकः, रक्तसैरेयकः कुरुबकः स्मृतः** ( ध. १. २७८, )
( रा. १०.४१२ ) तांबडी कोऱ्हांटी.

**अपरु**–पु., **वनस्पति०, खदिरः** ( ताम्रकंटकः रा. ८.३६ पृ. १२ ) खैर. तांबड्या काट्याचा.

**अपर्यागत**–वि., **अपक्वम्** ( सुसू. ४६.२१० ) अपक्व–कच्चे.

**अपर्युषित**–वि., **तद्दिनसिद्धम् अन्नादि** ( सुसू. ४६.३३९ )
त्याच दिवशी शिजविलेले. ताजे ( अन्न इ० ) शिळे नसलेले.

**अपर्वदण्ड**–पु., **वनस्पति०, रामकाण्डः, रामशरः**
**तद्गुणाः–अम्लः कषायः ईषदुष्णः रुचिप्रदः पित्तकृत् कफवातघ्नः च** ( रा. परि. ८.३६ )
बाणासारखी गवताची जात ( सरकांडे ) एक प्रकारचा ऊस. गुण--आंबट, तुरट, थोडा उष्ण, रुचिदायक, पित्तकर, कफवातनाशक.

**अपलाप**–पु., **मर्म०, वक्षोमर्म** ( सुशा. ६.६ )
**अंसकूटयोः अधस्तात् पार्श्वोपरिभागयोः**
( सुशा. ६.२५ ) **एष सिरामर्म** ( सुशा. ६.७ )
**कालान्तरप्राणहरः** ( सुशा. ६.११ ) **संख्यया द्वौ ( वामदक्षिणभेदेन ) मानम् अर्धाऽङ्गुलम्**
( सुशा. ६.२५ )
**तत्र विद्धे रक्तेन पूयभावगतेन मरणम्**
या नावाचे छातीमधले खांद्याच्या खाली फासळ्यांच्या वर हे आहे, हे शिरांचे मर्म, कालांतराने प्राण नाशक आहे, डावे उजवे असे दोन्हीकडे आहे. प्रमाण अर्धा अंगुल. ते कापले तर पू होऊन मरण.

**अपवर्ग**–पु., **तन्त्रयुक्ती०, साकल्येनोद्दिष्टस्य एकदेशापकर्षणम्** ( चसि. १२.४३ )
सामान्य विधानांतून कांहीं अंश वगळणे.
अपवाद युक्त विधान. सुकलेली फळे, भाज्या, मांस याखेरीज इतर शिळे खाऊ नये, शिळे खाऊ नये. या सामान्य विधानांतून फळे इत्यादी वगळली; हे अपवर्गाचे उदाहरण.
**अभिव्याप्य अपकर्षणम्, यथा अस्वेद्या विषोपसृष्टाः अन्यत्र कीटविषात्** ( सुउ. ६५.१८ )
व्यापक नियम सांगून त्याला अपवाद सुचवणे; जसे–विषपीडिताला स्वेद देऊ नये हा नियम असला तरी कीट विष पीडेला स्वेद द्यावा असा अपवाद सांगणे हे सुद्धा अपवर्गाचे उदाहरण होय.
**मोक्षः** ( चसू. २७.३५०–३५१ ) मोक्ष.
**निवृत्तिः** ( चशा. ५.११ ) व्यवहारातून मुक्त.

**अपवाद**–पु., **यत्र कश्चिन्नियमो न संगच्छते तद् उदाहरणम्** ( चवि. ८.१३४ ) ( असंसू. २३.८ )
ज्याला सामान्य नियम लागत नाही, असे उदाहरण.

**अपवृत्त**–वि., **विपरीतानुष्ठानपरः** ( सुउ. ६०.२६ )
विपरीत करणारा.
**वलितम्** ( सुचि. १५.९. ) घेरलेले, व्यापलेले.
**स्थानात् स्रस्तम्** ( सुसू. ११.२८., चचि. ३०.४५.)
स्वस्थानातून निखळलेले, ढळलेले.

**अपशोक**–पु., **वनस्पति०, अशोकः** ( रा. १०.२-७०., )
अशोक वृक्ष.

**अपसव्य**–वि., **अपसव्यम्; दक्षिणमित्यर्थः**
( असंसू. ३.४७., ) डावें.
**–वस्त्र– अपसव्योपवीतः** ( सुउ. ६०.१२., )
उजव्या खांद्यावरून व डाव्या हाताखालून घातलेले जानवे.
**–वासस्**–( परिव., वि., ) **दक्षिणाङ्गाश्रितमुत्तरीयवासः यस्य सः** ( सुसू. २९.८. )
उजव्या खांद्यावरून घेऊन डाव्या हाताखालून ज्याने वस्त्र घेतले तो.

**अपस्तन**–वि., **त्यक्तस्तनपानः** ( कासं. खिल., ८.१०५. ) अ., **स्तनाद्विदूरम्** ( असंउ. १,.७१. )
अंगावरचे दूध पीत नसलेले. स्तनपान सोडलेले.

**अपस्तन्य**–वि., **त्यक्तस्तन्यः** ( अहृउ. १.३९., )
अंगावरचे दूध सोडलेले ( तान्हे मूल )

**अपस्तम्भ**–पु., **वक्षःस्थानगतं मर्म** ( सुशा. ६.१० )
**स्थानम्–उरसःपार्श्वद्वयं वामदक्षिणभेदेन एतत् सिरामर्म, तत्र व्यधे सति शोणितपूर्णकोष्ठतया वातपूर्णकोष्ठतया कासश्वासाभ्यां कालान्तरेण मरणम्, संख्यया द्वौ, मानम् अर्धाङ्गुलम्**
( असंशा. ६.६., ) छातीतील एक मर्म.

स्थान–डाव्या उजव्या फासळ्यात. हे शिरेचे मर्म. ते कापल्यास रक्ताने व वाताने कोठा पूर्ण भरतो यामुळे खोकला व श्वास यांनी कालांतराने मरण येते. संख्या दोन. प्रमाण अर्धे अंगुळ.

**अपस्मार**–पु., रोग०, निरुक्तिः–स्मारः (स्मृतिः) नाम भूतार्थविज्ञानम् तद् भूतार्थविज्ञानं यस्मिन्नपगतं भवति स व्याधिरपस्मारः (सुउ. ६१.३)

तत्र तमः प्रवेशः बीभत्सचेष्टाश्च स्मृतिबुद्धिसत्त्वसंप्लवाद् भवन्ति (चचि. १०.३. चनि. ८.५) अस्मिंश्च विकारे किञ्चित्कालावस्थिता विगतसंज्ञता भवति ।

संप्राप्तिः– रजस्तमोभ्यामुपहतचेतसां प्रकुपिता दोषाः अन्तरात्मनः श्रेष्ठतममायतनं हृदयं तथा इन्द्रियायतनानि च उपसृत्य पर्यवतिष्ठन्ते । तत्रावस्थिताः सन्तः कामक्रोधभयलोभमोहहर्षशोकचिन्तोद्वेगादिभिश्च ईरिता हृदयमिन्द्रियायतनानि सहसाभिपूरयन्ति तेन च जन्तुरपस्मरति (चनि. ८.४)

अपस्मारव्याधौ कुपिता मलाः द्वादशाहात्, पक्षाद् मासाद्वा स्तोककालान्तरं वेगं कुर्वन्ति (चचि. १०.१३)

देवे वर्षत्यपि यथा भूमौ बीजानि कानिचित् ।
शरदि प्रतिरोहन्ति तथा व्याधिसमुद्भवः ॥ (सुउ. ६१.२०)

प्रथमा उत्पत्तिः– दक्षाध्वरध्वंसे विविधभूताशुचिस्पर्शात् देहिनामपस्माराणामुत्पत्तिः अभूत् (चनि. ८.११)

संख्या–चतुर्विधोऽपस्मारः वातजः पित्तजः कफजः संनिपातजः (सुउ ६१.१०.११; चनि. (१०.८. चनि. ८.३)

पूर्वरूपम्–भ्रूव्युदासः, सततमक्ष्णोः वैकृतम्, अशब्दश्रवणं, लालासिङ्घाणकप्रस्रवणम्, अनन्नाभिलाषा, अरोचकाविपाकौ, हृदयग्रहः, कुक्षेराटोपः, दौर्बल्यम्, अस्थिभेदः, अङ्गमर्दः, मोहः, तमसो दर्शनम्, मूर्च्छा, अभीक्ष्णं भ्रमः, स्वप्ने मदनर्तनव्यथनवेपनपतनादीनि (चनि. ८.६)

"हृत्कम्पः शून्यता स्वेदः ध्यानं मूर्च्छा प्रमूढता ।
निद्रानाशश्च तस्मिँस्तु भविष्यति भवत्यथ ।" (सुउ. ६१.७)

रूपम्–अविद्यमानानि रूपाणि पश्यति, पतति, जिह्वाक्षिभ्रुवः प्रस्फुरन्ति । स्रवल्लालः हस्तौ पादौ विक्षिपन् दोषवेगे विगते सुप्तवत्प्रतिबुध्यते । (चचि. १०.७,८)

वातजोऽपस्मारः– अभीक्ष्णमपस्मरणम्, उत्पिण्डिताक्षित्वम्, असाम्ना विलपनं, फेनोद्वमनम्। अतीवग्रीवाध्मानं, पूरितस्तब्धग्रीवत्वम्, आविद्धशिरस्त्वं, विषमविनताङ्गुलित्वं, पाणिपादानवस्थितत्वम्, नखनयनवदनत्वचाम् अरुणपरुषश्यावत्वम्, अनवस्थितचपलपरुषरूक्षरूपदर्शनं, वातलानुपशयत्वं, विपरीतोपशयत्वं च क्षणेन ससंज्ञत्वं चेति लक्षणानि । (चनि. ८.८) (१)

'कम्पते प्रदशेद्दन्तान् फेनोद्वामी श्वसित्यपि ।
परुषारुणकृष्णानि पश्येद् रूपाणि चानिलात् ॥' (चचि. १०.९)

'वेपमानो दशन् दन्तान् श्वसन् फेनं वमन्नपि ।
यो ब्रूयाद् विकृतं सत्त्वं कृष्णं मामनुधावति ॥'
ततो मे चित्तनाशः स्यात् सोऽपस्मारोऽनिलात्मकः ।' (सुउ. ६१.११,१२)

वातापस्मारे 'हृदि तोदः' इति विशेषलक्षणम् (सुउ. ६१.१६)

पित्तजोऽपस्मारः– अभीक्ष्णमपस्मरणं, क्षणेन ससंज्ञत्वम्, अवकूजनं, भूम्यास्फालनं, नखनयनवदनत्वचां हरितहारिद्रताम्रत्वं, रुधिरोक्षितोग्रभैरवादीप्तरूषितरूपदर्शनं, पित्तलानुपशयत्वं, विपरीतोपशयत्वं चेति लक्षणानि । (चनि. ८.८) (२)

' पीतफेनाङ्गवक्त्राक्षः पीतासृग्रूपदर्शनः ।
सतृष्णोष्णानलव्याप्तलोकदर्शी च पैत्तिकः ॥' (चचि. १०.१०)

' तृट्तापस्वेदमूर्च्छार्तो धुन्वन्नङ्गानि विह्वलः ।
यो ब्रूयाद् विकृतं सत्वं पीतं मामनुधावति ॥
ततो मे चित्तनाशः स्यात्स पित्तभव उच्यते ।' (सुउ. ६१.१३,१४)

कफजोऽपस्मारः–चिरादपस्मरणं, चिराच्च संज्ञाप्राप्तिः, पतनं, नातिविकृतचेष्टत्वं, लालोद्वमनं, नखनयनत्वचां शुक्लत्वं, शुक्लगुरुस्निग्धरूपदर्शनं, श्लेष्मलानुपशयत्वं, विपरीतोपशयत्वं चेति लक्षणानि (चनि. ८.८ (३)

' शुक्लफेनाङ्गवक्त्राक्षः शीतोहृष्टाङ्गजो गुरुः ।
पश्यन् शुक्लानि रूपाणि श्लैष्मिको मुच्यते चिरात् ॥ (चचि. १०.११)

**'शीतहृल्लासनिद्रार्तः पतन्भूमौ वमन्कफम् ।**
**यो ब्रूयाद्विकृतं सत्त्वं शुक्लं मामनुधावति ॥**
**ततो मे चित्तनाशः स्यात्सोऽपस्मारः कफात्मकः**
( सुउ. ६१.१४,१५ )

**संनिपातजोऽपस्मारः–समवेतसर्वलिङ्गम् अपस्मारं सांनिपातिकं विद्यात् । असौ असाध्यः**
( चनि. ८.८ (४)

**त्रिषु अपि वातजादिषु अपस्मारेषु प्रलापः, कूजनं, क्लेशः इति प्रत्येकं लक्षणानि भवन्ति**
( सुउ. ६१.१६ )

**अपस्मारो व्याधिः न दोषजः इति केषांचिन्मतम् । आगन्तुरपस्मारः नास्ति इति सुश्रुतमतम्**
( सुउ. ६१.१७,१९ )

**अपस्मारोपद्रवाः–बहुशः अपस्मरणं, प्रक्षीणता, भ्रूचलितत्वं, नेत्रद्वयविकृतियुक्तत्वम्**
( सुसू. ३३.२६ )

**अपस्मारस्य अरिष्टलक्षणम्–**
**मत्तं नृत्यन्तमाविध्य प्रेतो हरति यं नरम् ।**
**स्वप्ने हरति तं मृत्युरपस्मारपुरःसरः ॥**
**असत्तमः पश्यति यो यःश्रुणोत्यसतः स्वनान् ।**
**बहून् बहुविधान् जाग्रत्सोऽपस्मारेण वध्यते ॥**
( चइ. ५.२२,२३, असंउ. १०, अहृउ. ७. )

स्मार म्हणजे स्मृति किंवा गतगोष्टींचे यथार्थ ज्ञान. ते ज्यात नष्ट होते तो रोग अपस्मार. यात अंधारात शिरल्यासारखे वाटणे, वेडीवाकडी हालचाल ह्या सर्व गोष्टी स्मरणशक्ति, विचारशक्ति आणि मन विकृत झाल्यामुळे घडतात.

संप्राप्ति—रज व तमो गुणांनी मन दूषित होऊन प्रकुपित दोष अंतरात्म्याचे श्रेष्ठतम स्थान जे हृदय आणि इंद्रियांची स्थाने यात प्रवेश करून राहतात; व तेथे असताना काम, क्रोध, भय, लोभ, मोह, हर्ष, शोक, चिंता, उद्वेग इ० विकारांनी प्रेरित होऊन हृदय व इंद्रिय स्थानांना एकदम व्यापतात; आणि त्यामुळे मनुष्य ह्या विकाराने पीडित होतो.' ह्या अपस्मार रोगात कुपित झालेले दोष बारा, पंधरा दिवसांनी किंवा महिन्याने अथवा थोड्या वेळानंतर वेग उत्पन्न करतात. .पाऊस पडला असताही जशी काही बीजे शरद ऋतूतच उगवतात तसाच प्रकार ह्या रोगाच्या वेगाचा आहे.

उत्पत्तीविषयी पौराणिक कथा—दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस झाल्यावेळी नानाविध भूतांचा अपवित्र स्पर्श होऊन ह्या अपस्माराची मानवाचे ठिकाणी उत्पत्ती झाली. संख्या–वातज, पित्तज, कफज आणि संनिपातज असे ४ प्रकार ह्याचे आहेत.

पूर्वरूप–भुवया वाकड्या होणे, डोळे एकसारखे विकृत होणे, बोललेले ऐकू न येणे, लाळ व शेंबूड जाणे अन्नाविषयी इच्छा नसणे, अरुचि, अपचन, हृदय जखडणे, पोटात गुडगुड आवाज, दुर्बलता, हाडे फुटतात असे वाटणे, आंगाला आळोखे पिळोखे येणे, काहीही न सुचणे, समोर अंधार वाटणे, मूर्च्छा, वारंवार भोवळ, स्वप्नात उन्मत्त होऊन नाचणे, कंप, पडणे, भोसकल्यासारखी पीडा, हृदयात थरकाप, ध्यानमग्नासारखी स्थिति, घाम, मूर्च्छा, विचारशक्ति आणि निद्रानाश ही ह्या रोगाची सूचक लक्षणे आहेत. स्पष्टलक्षणे—जे प्रत्यक्षात नाहीत असे देखावे दिसणे, पडणे, जीभ, डोळे, भुवया यांचे ठिकाणी स्फुरण, लाळ गळणे, हातपाय आपटू लागणे, आणि वेग शांत झाला कीं झोपेतून उठल्या प्रमाणे जागे होणे. वातज अपस्मार–वेग वारंवार येतात, डोळे वर उचलल्या सारखे, जोराने रडणे, फेसयुक्त वांती, मान अतिशय फुगणे, भरल्यासारखी व ताठ होणे, डोके वाकडे होणे, बोटे वेडीवाकडी वळणे, हातपाय एका स्थितीत न राहणे, नखे, डोळे, तोंड आणि त्वचा तांबुस, खरखरित, काळसर होणे, अव्यवस्थित चंचल, कठोर, रूक्ष अशी दृश्ये दिसणे, वातुळ द्रव्यांनी बरे न वाटणे व त्या विरुद्ध द्रव्यांनी बरे वाटणे, थोड्याच वेळात शुद्धि येणे, दातखाणे ही लक्षणे होऊन अकाळ विकाळ काळापुरुष माझ्याकडे धावत येतो म्हणून माझे मन अस्वस्थ होते असे तो रोगी म्हणतो. हृदयात टोचणी हे विशेष लक्षण ह्या प्रकारात असते.

पित्तज अपस्मार–वेग वारंवार येऊन क्षणभरातच शुद्धि येणे, कण्हणे, जमीन थोपटणे, नखे, डोळे, तोंड, त्वचा ह्यांचा रंग हिरवा, पिवळा, तांबडा, होणे, सर्वत्र रक्त शिंपले आहे असे उग्र, भीतिदायक व पेटल्यासारखे देखावे दिसणे, पित्तकारक द्रव्ये न सहन होणे व त्या विरुद्ध द्रव्यांनी बरे वाटणे, येणारा फेस, आंग, तोंड डोळे पिवळे व देखावेही पिवळे व रक्तासारखे लाल दिसणे, तहान, उष्णता, सगळ्या दिशा अग्नीने पेटल्यासारख्या दिसणे, ताप, घाम, मूर्च्छा, सर्व अवयव सारखे हलवीत असणे, विव्हल होणे, कुणीतरी

वेडावाकडा प्राणी माझ्याकडे धावत येतो व म्हणून माझे चित्त व्याकुळ होते असे तो म्हणतो.

कफज अपस्मार—वेग फार उशिरा येऊन शुद्धी सुद्धां उशिराच येणे, पडतो, वेडीवाकडी हालचाल विशेष करीत नाही, लाळेचीच वांती होते, नखे, डोळे, त्वचा पांढरी, सर्व द्रव्ये पांढरी, मोठी व स्निग्ध दिसतात; कफकारक पदार्थ मानवत नाहीत व त्या विरुद्ध द्रव्यांनी बरे वाटते; येणारा फेस पांढरा असतो, सर्व अवयव तोंड व डोळे पांढरे पडतात. आंग गार पडते, रोमांच येतात, जडत्व वाटते, वेगही पुष्कळ उशिरा ओसरतो, उम्हासे येतात, झोप खूप येते, जमिनीवर पडत असतांच कफाची वांती होते, कुणीतरी पांढरी वेडी वाकडी आकृति माझेकडे धावत येते त्यामुळे माझे चित्त अस्वस्थ होते असे तो म्हणतो.

सन्निपातज अपस्मार—सर्व ही दोषांची लक्षणे सन्निपातज अपस्मारात होतात; तो असाध्य असतो. ह्या वातादि दोषांनी होणाऱ्या तीनही अपस्मारांमध्ये बडबड, कण्हणे व अतिक्लेश ही लक्षणे असतात.

अपस्मारव्याधि दोषांच्या बिघाडाने होत नाही, असे काहींचे मत आहे. आगंतु अपस्मार नाही, असे सुश्रुतमत आहे. अपस्माराचे उपद्रव—वेग पुष्कळ येणे, अतिक्षीणता, भुवया चाळवणे, दोन्ही डोळ्यांची ठेवण बिघडते.

अरिष्टलक्षणे—स्वप्नात उन्मत्त होऊन जो नाचतो, व ज्या माणसाला यम खेचून नेत आहे असे दिसते, अंधार नसता ज्याला अंधार वाटतो, आवाज होत नसताही ज्याला जागेपणी निरनिराळ्या प्रकारचे आवाज ऐकू येतात तो अपस्मार रोगी मरतो.

**–चिकित्सित**–( न.,) **अध्याय०** ( चचि. १० )
अध्यायाचे नाव.

**–नाशन**–पु., **योग०** ( र. २३.८–१६ )
अपस्मार नाहीसा करणारा एक योग.

**–निदान**–न., **अध्याय०** ( चनि. ८. )
अध्यायाचे नाव. यात अपस्माराची कारणे इ० माहिति दिली आहे.

**–प्रतिषेध**–पु., **अध्याय०**, ( सुउ. ६१. )
अध्यायाचे नाव. यात अपस्मारावरचे उपचार दिले आहेत.

**अपस्मृति**–स्त्री., **रोग०**, **अपस्मारः** ( अहसू. २७.१२. )
अपस्मार.

**अपस्वर**–क्रि. वि., अव्य., **विकृतस्वरं यथा भवति तथा** ( चइ. ९.१४., असंशा. ९. )
विकृत स्वर, बेसूर स्वर.

**अपाक**– वि., **अविद्यमानपाकः, ईषत्पाको वा.** ( सुचि. १.३३. ) न पचलेले किंवा थोडे पचलेले.

**अपाकिन्**–वि.. **जठरानलेन पक्तुमशक्यम्** ( सुक. २.२० ) पाचकाग्नीने पचणे अशक्य असलेले.

**अपाङ्ग**–पु., **शारीर०**, **भ्रूपुच्छान्तः** ( सुसू. २३.६. )
भुवईच्या शेपटाचे शेवटचे टोंक.
**नेत्रसंधिविशेषः** ( असंशा. ५. )
डोळ्याचा बाहेरचा संधि.
**शङ्खसंधिः, शङ्खः** ( ड. सुउ. ६२.३३. ) कानशील.
**( अपाङ्गी )**–स्त्री., **शारीर०**, **सिराविशेषः**, **भ्रूपुच्छान्तस्थ सिरा** ( सुशा. ८.१७. ) **अक्ष्यामयेषु अस्याः व्यधनमुक्तम्.**
भुवईच्या शेवटी असलेली शीर. डोळ्यांच्या विकारात हिचा वेध करण्यास सांगितले आहे.
**देश**–पु., **शारीर०**, **कर्णपुत्रिकाया अधस्तिर्यग्देशः** ( सुसू. १६.२३. )
कानाच्या पाळीचा खालचा भाग.
**–मर्मन्**–न., **भ्रूपुच्छान्तयोरधः अक्ष्णोः बाह्यतः अपाङ्गौ नाम मर्मणी तयोर्व्यधात् आन्ध्यं, दृष्ट्युपघातो वा भवति** ( सुशा. ६.२७. ) **एतदपाङ्गमर्म, शिरोमर्म, सिरामर्म च. विद्धं च सद् वैकल्यकरं, संख्यया द्वे** ( सुशा. ७.२२. ) **मानतोऽर्धाङ्गुलञ्च।** ( सुशा. ६.२७. )
एक मर्म. भुवईच्या शेवटी, खाली डोळ्याच्या बाहेर आहे. ह्याचा वेध झाल्याने अंधत्व किंवा दृष्टीला अपाय होतो. हे शिरोमर्म व सिरामर्म आहे. विकलता निर्माण करणारे हे दोन्ही बाजूस अर्धे अर्धे अंगुल आहे.

**अपांधातु**–पु., **अब्धातुः**, **कायद्रवः** ( सुउ. ४०.६ )
जलधातु. शरिरातील द्रव.

**अपान**–पु., **शारीरवायुविशेषः** ( सुनि. १.१९ ) **तन्निरुक्तिः–अपानिति अधोदेशान्निःसरति, इत्यपानः, कर्म चास्य मूत्रपुरीषादेरधः अपनयनम्।**
शरिरातील एक वायु. खालच्या द्वाराने ( गुदद्वाराने ) सरणारा तो. कर्म–मूत्र विष्ठादिकांना खाली नेणे,
**न., गुदस्थानम्** ( अहसू. १२.९., ) गुद अवयव.
**निश्वासः** ( चशा. १.७० ) बाहेर सोडलेला श्वास.

**अपामार्ग**–वनस्पति०, ( चसू. २.३, ) **श्वेतापामार्गः रक्तापामार्गः तोयापामार्गश्चेति त्रिविधः; अस्य मूलं**

**व्रणेषु मांसवर्धनार्थमुपयुज्यते।** ( सुसू. ३७.३०; ) **बीजानि च शीर्षविरेचनार्थमुपयुज्यन्ते।** ( चसू. २.३–५; ) **अपामार्गक्षारोऽपि उपयुज्यते।** ( सुसू. ११.११; ) **'अन्धडक' इति लोके** ( सुसू. ३९.६ ) **अपामार्गगुणाः–तिक्तः कटुः, उष्णः, ग्राही, वान्तिकृत्, कफघ्नः, अर्शः कण्डूदरामय–रक्तविकार–व्रणसिध्मापची–मेहघ्नः**

( ध. १.२६०, रा. ४.२६४.२६५ )

**'अपामार्गः सरस्तीक्ष्णः दीपनस्तिक्तकः कटुः। पाचनो रोचनश्छर्दिकफमेदोऽनिलापहः॥ निहन्ति हृद्रुजाध्मानकण्डूशूलोदरापचीः।'** ( भा प्र० )

आघाड्याचे पांढरा, तांबडा, आणि जलीय आघाडा असे तीन प्रकार आहेत. याचे मूळ व्रणातील मांस वाढण्याला, बी डोक्याचे रेचक म्हणून योजतात. याचा क्षारही उपयुक्त. 'गुण–' कडु, तिखट, उष्ण, तीक्ष्ण, मळ बांधणारा, मूळव्याध, खाज, उदर, रक्तविकार, व्रण, कोड, जुन्या गंडमाळा, प्रमेहनाशक व दीपक पाचक, मेद, हृदयातील वेदना, पोटफुगी, शूलनाशक, वांती करणारा, कफनाशक, सारक, तीक्ष्ण, वातनाशक, शूलहर.

**–तण्डुल**–पु., **अपामार्गस्य निस्तुषं बीजम्** ( चसू. २०.१ ) आघाड्याचे टरफल काढलेले बी.

**–तण्डुलीय**–पु., अध्याय (चसू. २) अध्यायाचे नाव.

**अपाय**– पु., **अभावः** ( चचि. २२.८१ ) **व्याध्यपगमनम्** **हानिः** ( चइ. १.३ ) अभाव, रोगमुक्ती, नाश.

**अपार्थ–(क)**–वि,. **प्राकृतार्थरहितं, निरर्थकम्, व्यर्थम्** ( सुक. १.२० )

योग्य अर्थ नसलेले काहीतरी, निरर्थक, व्यर्थ.

**न; वाक्यदोषविशेषः, अर्थयुक्तपदानि परस्परमसंबध्दानि यत्र प्रयुक्तानि तत्र तद् वचनमपार्थकम्। यथा चक्रनक्रवंशाः। अपार्थकं नाम यद् अर्थवच्च परस्परेण चायुज्यमानार्थकम्** ( चवि. ८.५४ )

एक वाक्यदोष. ज्यात असंबद्ध अर्थाचे शब्द योजले आहेत असे. युक्त शब्दांच्या परस्पर संबद्ध अर्थाचा बोध न होणारे वाक्य.

**अपालाप**–न., **मर्मविशेषः, अपलापः** ( असंशा. ७ ) एक मर्म.

**अपांवाहिस्रोतस्**–न., **उदकवहस्रोतः** ( सुउ. ४८.५ ) जलवह स्रोतस.

**अपाश्रय**–पु., **प्रतिवाहकः, उपधानम्** ( सुशा. १०.३ ) **प्राङ्गणावरणम्, मत्तवारणः** ( **हलायुधकोशः** ) उशी; अंगणांत अंथरावयाचे अंथरूण, कुंपण, झाडांचे कुंपण, माजलेला हत्ती.

**अपिधान**–न., **कपाटम्, आच्छादनम्** ( चशा. ८.३३ ) दाराची फळी, आच्छादन.

**अपीनस्**–पु., **रोग०, नासारोग०, दुष्टप्रतिश्याय०, पीनसः** ( चचि. २६.११४ सुउ. २२.६ ) दुष्ट पडसे, पीनस.

**अपुनर्भव**–पु., **पुनरुत्पादाभावः** ( असंसू. २.१२ ) पुनर्निर्माणाचा अभाव.

**पुनः पूर्वरूपग्रहणे पूर्वप्रकृतेः अङ्गीकारे वाऽसमर्थः ( लोहादीनाम् )** ( र. ८.२८ )

धातूंचे भस्म झाल्यानंतर पुन्हा त्या धातूचे स्वरूप प्राप्त न होणे.

**–कर**–वि., **नष्टस्य पुनरुत्पत्तिनिवारकम्** (असंसू. १२.३) नष्ट झालेल्याची पुन्हा उत्पत्ति होऊ न देणारे.

**अपुनर्भाव**–पु., **अपुनर्भवः** (अहसू. ७.–५०.र. १०.४९) पुन्हां न होणे.

**अपुष्प**–पु., **वनस्पति०, उदुम्बरः** ( र. २२.१५५ ) उंबर.

**–फलद्**–पु., **पनसः** ( रा. परि. ११.१० ) फणस.

**–फलसंबन्ध**–पु., **उदुम्बरः** ( ध. ५.८६ ) उंबर.

**अपुंस्**–पु., **लक्षण०, क्लीबः** ( चचि. ३०.१८९-१९० ) नपुंसक.

**अपूप**–पु., **कृतान्न०**, ( चसू. २७.२६५ )

घारगा, वडा, अनारसा इ०

**मण्डकः** ( असंउ. ४ )

**पिष्टकृतास्तनवो विस्तृता अपूपाः** ( अहसू. ६.४२ )

घारगे, अनारसे, मांडा, वडा, पिठाचा पातळ म्हणजे झिरझिरीत केलेला पदार्थ.

**धान्य०, गोधूमः** ( रा. १६. १५१ ) गहू.

**अपूर्व**–( परिव. वि. ) **प्रथमम्।** ( सुचि.२६.१९ ) प्रथम.

**–वैद्य**–पु., **अपूर्वः, आश्चर्यभूतः वैद्यः** (अहसू. १.१) पूर्वीच्या वैद्यातील प्रथम वैद्य. आश्चर्य वाटण्यासारखा वैद्य.

**–संभव**–पु., **अभूतपूर्वस्योत्पत्तिः** ( असंशा. १२.३ ) पूर्वी न झालेले निर्माण होणे, पूर्वी नसलेल्याची उत्पत्ति.

**अपेतराक्षसी**–स्त्री., **तुलसी, सुरसा** ( चचि. १०.३९ ) तुळस.

**अपेलव**–वि., **उद्धृतस्नेहम्** ( चचि. १३.१०१ ) स्नेह काढून घेतलेले, लोणी काढून घेतलेले.

**अपेहिवाता**–स्त्री., **वनस्पति०, प्रसारणी** ( सुचि. १८.४ ) चांदवेल.

**अपोह्य**–वि., **अपसारणीयम्, त्याज्यम्** ( सुउ. ६०.२१ ) त्याज्य. दूर सारण्यासारखे.

**अप्रकम्प्य**–वि., **स्थिरः, अपरिवर्तनीयः** ( अहसू. ७.५० ) स्थिर, न बदलणारे.

**अप्रकृतक**–वि., **प्रकरणसम्बद्धार्थरहितम्** ( चवि. ८.६० ) प्रकरणाशी जुळता अर्थ नसलेले.

**अप्रगुण**–वि., **विचलितम्, विकृतम्, यत्स्वकार्यं न करोति** ( चसू. १३.५७ ) अस्थिर, विकृत. जे स्वतःचे कार्य करीत नाही.

**अप्रचेतन**–वि., **स्पर्शज्ञानरहितम्** ( सुचि. ५.३२ ) स्पर्शज्ञान नसलेले. स्पर्शज्ञानाचा अभाव.

**अप्रजस्**–वि., **अपत्यरहितम्** ( असंसू. ९.६९ ) संततिरहित. विनापत्य. निपुत्रिक.

**अप्रजा**–स्त्री., **योनिरोग०, लब्धगर्भायाः असृक्स्रावेण गर्भो न तिष्ठति** ( चचि. ३०.१६ ) एक योनिरोग. रक्तस्रावाने गर्भस्राव होण्याची खोड असल्याने ती निपुत्रिक रहाते; म्हणून या विकारास 'अप्रजा' म्हणतात.

**अप्रतान्त**–वि., **अबुभुक्षितः** ( चचि. १५.२३३ ) भूक न लागलेला.

**अप्रतिकारसेविन्**–वि., **चिकित्सामकुर्वाणः** ( सुउ. २०.८ ) चिकित्सा न करणारा रोगी, औषध न घेणारा रोगी.

**अप्रतिवार**–वि., **दुर्निवार्यम्** ( सुचि. ४.२९ ) दुर्निवार, अनिवार्य.

**–वीर्य**–वि., **दुर्निवारशक्तिः** ( सुनि. १६.५३ ) ( सुचि. ४.२९ ) पराभूत न होणारे बल.

**अप्रतिषिद्ध**–वि., **अनिषिद्धम्।** ( सुउ. ६५.२८ ) निषिद्ध नसणारे.

**अप्रतिसम्बद्धार्थ**–वि., **वाक्यदोष०, असंबद्धम्, असङ्गतम्** ( वाक्यादि ) ( चवि. ८.५४ ) असंबद्ध–विसंगत वाक्य.

**अप्रतीघात**–पु., **अस्पर्शत्वम्, आकाशस्य स्पर्शनेन्द्रिय-गोचरं लक्षणम्** ( चशा. १.२९ ) **'येनेन्द्रियेण यस्य भावो गृह्यते तेनैवेन्द्रियेण तस्याभावोऽपि गृह्यते' इति नियमात्।** स्पर्शाभाव. स्पर्शाचा अभाव. ज्या इंद्रियाने ज्याचा भाव ग्रहण करता येतो त्याच इंद्रियाने त्याचा अभावही घेतला जातो असा नियम आहे.

अप्रतिहननम्–( सुशा. ७.८ ) अप्रतिबंध, अडथळा नसणे, अविरोध.

**अप्रमत्त**–वि., **सावधानः** ( सुचि. ९.४१ ) सावध.

**अप्रमेय**–वि., **प्रमातुमशक्यम्** ( सुसू. ४६.३३१ ) अपरिमित, मोजण्यास अशक्य, न मोजता येण्या-सारखे.

**अप्रयत**–वि., **अपवित्रम्** ( चइ. १२.१० ) अपवित्र.

**–भाव**–पु., **अशुचित्वम्** ( असंउ. ७ ) अशुद्धत्व.

**अप्रवात**–पु., **अप्रवेगो वायुः** ( असंसू. १२ ) वाऱ्याची झुळुक.

**अप्रहर्ष**–पु., **लक्षण०, स्त्रीविषयेऽनभिलाषः, लिङ्गशैथि-ल्यम्** ( सुसू. २४.९ ) वैषयिक इच्छा नसणे. लिंगाची शिथिलता, स्त्रीची इच्छा नसणे.

**अप्राप्तफलकोशा**–( वि., ) **वृषणग्रन्थिकोशमप्राप्ता,** ( अन्त्रवृद्धिप्रकारः, ) ( सुचि. १९.३१ ) वृषणात न उतरलेला अंतर्गळ

**आप्राप्तातीतकाल**–( वि., ) **कालपूर्वं, कालातीतं वा** ( सुसू. ) ( ४६.४७१ ) योग्य काळापूर्वी. योग्य काळ टळल्यानंतर.

**अप्राप्तावी**–( वि., ) **अनागतप्रसववेदना** ( सुशा. १०.९ ) वेणा न आलेली. वेणा नसलेली.

**अप्राप्तोदीरण**–( न., ) **लक्षण०, वेगाभावेऽपि वेगो-दीरणम्** ( चचि. ३०. २३३ ) मलमूत्रोत्सर्जनाची संवेदना नसताना ही मुद्दाम उत्सर्जनाचा प्रयत्न, कुंथणे

**अफल**–पु., **व्रीहिः** ( रा.१६.११७ ) एक प्रकारचे तांदूळ.

**अफूक**–न., **निर्यास० खसखसफलस्य निर्यासः, उपविषभेदः, तद्गुणाः–शोधनं शोषणं, ग्राहि, वृष्यं, बल्यं, वातपित्तकरं, कफघ्नं संनिपातघ्नं च** ( ध. ६.१२१. ) खसखशीच्या फळाचा डिंक. अफू. अफीण. एक उपविष.

**गुण**–शोषक, शोधक, मळ घट्ट करणारी, शुक्र व बल यांना हितकर, वातपित्तकर, कफनाशक, संनिपात-नाशक.

**अफेन**–न., **अफूकम्** ( रा. ६.१९१ ) अफू, अफीण

**अफेनक**–न., **अफूकम्** ( ध. ६.१२१ ) अफू, अफीम.

**अबद्धमांसहर**–( वि., ) **लक्षण०, अनिबिडमांसहरः,** ( चचि. १ पा. २.३ ) शिथिलमांसनाशक, शिथिलत्व नाहीसे करून बद्धमांस निर्माण करणारे.

**अबन्ध्य**–वि., **बन्धनायोग्यम्** ( सुसू. १८.३२ )
बांधण्यास अयोग्य.

**अबलश्रोत्र**–वि., **लक्षण०, रुद्धश्रवणमार्गः, शब्दश्रवणासमर्थः** ( अहृसू. २०.२७ )
ज्याचा कान अबल आहे तो. बहिरा.
ऐकण्याचा मार्ग अडवला गेला आहे तो.

**अबला**–स्त्री. **स्त्री** ( सुशा. ३.१२ ) स्त्री.

**–क्षीर**–न., **स्त्रीस्तन्यम्** ( सुउ. १२.४३ )
अंगावरचे दूध. मानवी स्त्रीचे दूध.

**अबात्मक**–वि., **आप्यम्, जलीयम्** ( सुशा. ४.१२ )
जलीय. आप्य. ज्यात आप महाभूत जास्त आहे ते द्रव्य.

**अबीज**–वि., **प्रजोत्पादनेऽसमर्थम्** ( सुशा. २.५ )
बीज नसलेला. प्रजोत्पादनाला असमर्थ.

**अबुद्धित्व**– न., **अबोधः, मन्दबुध्दित्वम्**
( चसू. १६.१५ ) अज्ञानत्व. मंदबुद्धित्व.

**अब्ज**–न., **कुमुदम्** ( ध. ४.१५४ )
कमल. पाण्यात झालेले.

**अब्जिनी**–स्त्री., **पद्मिनी** ( ध. १.४० ) कमलिनी.

**अब्द**–पु., **मुस्ता** ( सुचि. ३८.५१ ) नागरमोथा.
**वालकम्** ( र. १८.४८ ) वाळा.

**–ध्वनि**–पु., **वनस्पति०, तण्डुलीयकः** ( र. १०.२२)
तांदुळजा.

**अब्धि**–पुं., **समुद्रः** ( रा. ३.४ ) समुद्र.

**–डिण्डीर**–न., **समुद्रफेनः** ( र. २४.१४ )
( अहृसू. १५.२५ ) समुद्रफेस.

**अब्रह्मचर्य**–न., **स्त्रीसमागमः** ( अहृसू. ७.५२ )
स्त्रीसंभोग, स्त्रीसेवन.

**अभक्त**–न., **अभोजनं, विगुणं भोजनम्** ( चचि. १२.५)
**औषधकालविशेषः, यत् केवलमन्नरहितमौषधम् उपयुज्यते तत्, अनन्नमिति पर्यायोऽप्यत्रावधेयः ।**
( सुउ. ६४.६६, असंसू. २३.१३ )
भोजन नसणे, दुष्ट आहार–खाणे.
एक औषधि काल. रिकामे पोटी औषध घेणे ते अनन्न

**–च्छन्द**–पु., **रोगलक्षण०, भक्तारुचिः**(सुउ.४१.१३)
**भोजनानभिलाषः** ( ड. सुचि. २.१४ )
अन्नाची अरुचि. जेवण करू नये असे वाटणे, अन्नाची अनिच्छा
वि., **अन्नश्रध्दाविहीनः, 'यस्य नान्ने भवेच्छ्रध्दा सोऽभक्तच्छंद उच्यते । कुपितस्य भयार्तस्य यश्च भक्तनिरोधजः ।** ( मा. नि. अरोचक–मधु )
अन्नावरची इच्छा नष्ट झालेला. रागावणे, भीति, व मुद्दाम अन्न न खाणे यांमुळें हा विकार होतो.

**–रुज्**–स्त्री., **अन्नारुचिः** ( सुउ. ४९.११ )
अन्नाबद्दल अरुचि.

**अभङ्गुर**–वि., **राजिरहितम्** ( सुसू. ३६.३ )
भेगारहित, रेषारहित.

**अभय**–न., **वनस्पति०, हरीतकी** ( चसू. ५.६४ ) हिरडा.
**उशीरम्** ( चसू. ३.२९ ) काळा वाळा.

**अभया**–स्त्री., **वनस्पति०, हरीतकी** ( चसू. २६.५१ )
हिरडा.

**–गुड**–पु., **पाण्डुरोगघ्नो योग०** ( सुउ. ४४.१६ )
पांडुरोगनाशक एका योगाचे नांव. हिरडा गूळयुक्त.

**–प्रयोग**–पु., **अभयायाः प्रयोगः संतर्पणव्यापत्तिनाशकोऽयम्** ( चसू. २३.१७ )
पुष्टिवर्धक द्रव्यांच्या अतिसेवनाने झालेल्या विकारावर उपयुक्त असा प्रयोग.

**–प्राश**–पु., **योग०, हरीतकीप्राशोऽगस्त्यहरीतक्यादिप्राशो वा** ( चसू. २३.९ )
हिरड्याचा चाटून खाण्यासारखा कल्प.

**अभयामलकीय**–पु., **अध्यायपाद०** ( चचि. १ पा. १ )
या नावाचा एका अध्यायाचा विभाग.

**अभयारिष्ट**–पु., **मद्य०, ग्रहणीपाण्डुहृद्रोगादिहरः, विशेषेण अर्शोघ्नः** ( चचि. १४.१३८–१४३ )
ग्रहणी, पांडु, हृद्रोग इ० नाशक असे हिरड्याचे अरिष्ट, विशेषतः मूळव्याधनाशक.

**अभाव**–पु., **विनाशः** ( चचि. १३.५१ ) नाश.

**अभिकाम**–वि., **अभिलाषुकः** ( सुउ. ६०.१२ )
अभिलाषा–इच्छा असलेला.
**स्त्रीसंजिगमिषुः** ( सुचि. २४.१३१ )
स्त्रीसंगमाची इच्छा असलेला

**अभिकामा**–वि., **पुरुषसंजिगमिषुः** ( सुचि. २४.१३१ )
पुरुषसंगमाची इच्छा असलेली.

**अभिखिन्न**–वि., **लक्षण०, आक्रान्तम्** ( चक. १२.८ )
व्याप्त ( दोषांनी )

**अभिग्राहक**–वि., **अधिष्ठातृ** ( चशा. ३.१३ )
अधिष्ठाता. ( मन )

**अभिघात**–पु., **आघातः** ( चचि. ३.१११–११२ )
आघात.

**–काल**–पु., **शरीरप्रवेशकालः** ( चनि. ७.१७ )
शरिरात प्रवेश करण्याची वेळ, शरिरावर हल्ला करण्याची वेळ.

**अभिघार**–पु., न., **क्षीरविकार०, घृतम्** ( ध. ६.१४४ ) तूप.

**अभिघारित**–वि., **ईषद् घृताक्तं** ( सुचि. ३०.५ ) थोड्या तुपाने माखलेले.

**अभिचार**– पु., **प्रयोग०, हिंसार्थोऽथर्वमन्त्रहोमादिः, आगन्तुज्वरस्य हेतु०,** ( चचि. ३.१११–११२ ) हिंसेकरितां मंत्रहोमादि करणे. हे आगंतुकज्वराचे कारण आहे.

**मन्त्रादिभिर्मारणप्रयोगः** ( सुउ. ३९.७९ ) मंत्रादिकांनी केलेला मारण प्रयोग.

**अभिजन**– पु., **विशुद्धकुलम्** ( चसू. ८.१८, ) शुद्ध कूळ.

**अभिजित्**– पु., **ऋषि०, रोगापहरणचिन्तार्थं हिमवतः पार्श्वे समेतेष्वेकः** ( चसू. १.१० ) एक ऋषि. रोगोपचारांच्या विचारविनिमयाचे वेळी हिमालयाच्या उतरणीवर जमलेल्या ऋषींपैकी एक.

**अभिज्ञान**–न., **चिह्नम्** ( चशा. ८.४४ ) चिन्ह, खूण.

**अभिताप**– पु., **रोगलक्षण०, तापः रोग०, अश्वज्वर०** ( अंसनि. १.५ ) तापणे, तप्त होणे. घोड्याच्या एका ज्वराचे नाव.

**अभितापन**–वि., **सर्वतः तापयतीति** (सुउ. २०.१२) सर्व बाजूंनी तापविते ते.

**अभितापन**–वि., **रोगलक्षण०, अभितो द्रवणं नाम पलायनम्, यथा पित्तोन्मादे** ( चनि. ७.७ ( २ ) पित्तज उन्मादासारख्या विकारात रोगी पळतो तसे पळणे.

**अभिद्रुत**–वि., **लक्षण०, पीडितम्** ( सुउ. ५५.१८ ) पीडलेला.

**अभिद्रोह**–पु., **परपीडार्था प्रवृत्तिः** ( चवि. ४.८ ) **शत्रुभावः, वैरम्** ( चनि. १.१५ ) दुसऱ्यांना त्रास देण्याची प्रवृत्ति, वैर, शत्रुत्व.

**अभिधर्षण**–न., **धृष्टता, अनादरः पूज्येषु** ( चशा. १.१०४ ) उद्धटपणा, फाजिलपणा. पूज्य व्यक्तीविषयी अनादर.

**आवेशः** ( चचि. ९.१६ ) शरीरप्रवेश ( पिशाचादिकांचा )

**अभिधारण**–न., **यन्त्र०, अग्निधारणयन्त्रम्** ( र. १६.६० ) अग्निधारक यंत्र.

**अभिध्या**–स्त्री., **मनसा पराभिद्रोहचिन्तनम्** ( चसू. ७.२७ ) दुसऱ्यांना त्रास देण्याच्या–हाल करण्याच्या दृष्टीने विचार अथवा योजना करणे.

**परगुणाद्यसहिष्णुता** ( अहसू. २.२२ ) दुसऱ्याच्या गुणांचा–उत्कर्षाचा मत्सर करणे.

**अभिध्यातृ**–वि., **मनसा द्रोहणशीलः** ( चशा. ८.२१ ) मनाने द्वेष करण्याच्या स्वभावाचा. द्वेषी.

**अभिध्यायिन्**–वि., **ध्यानशीलः, चिन्तनशीलः** ( असंशा. २ ) ध्यानी, विचारी. नेहमी ध्यान–चिंतन करणारा.

**अभिनव**–वि., **अनतिक्रान्तसंवत्सरम्** ( सुसू. ३६.७ ) वर्षाच्या आतले. ( नवे. ) नव्या वनस्पति वापराव्या.

**अभिनिर्वृत्ति**–स्त्री., **उत्पत्तिः** ( चवि. ८.७२ ) उत्पत्ति **व्यक्तता** ( चशा. ३.१२ ) व्यक्त होणे. उत्पन्न होणे.

**अभिनिवेश**–( परिव. ) पु., **निश्चयः** ( चसि. २.२५ ) निश्चय.

**अभिन्नचक्षुस्**–वि., **अभिन्नतारकः, अभिन्नदृष्टिः** ( चचि. २६.२५६ ) ज्याचा डोळा फुटला नाही तो. बाहुली शाबूत असलेला.

**अभिन्यास**–पु., **रोग० सन्निपातज्वरभेदः,** एक त्रिदोषज ज्वर. एकदोषी ज्वर. एक अविसर्गी दोषी ज्वर.

**संप्राप्तिः–उरःस्रोतोनुगामिन आमाभिवृद्ध्या प्रकुपितास्त्रयो दोषा बुद्धीन्द्रियमनोगताः सन्तो महाघोरमभिन्यासं जनयन्ति । अस्य मर्यादा पञ्चदिनानि ।**

**तेनास्य रुग्णस्य श्रुतौ नेत्रे च प्रसुप्तिः, न कस्यांचित् चेष्टायामीहा, तथा च गन्धस्पर्शशब्दानां नैव बोधः। अनेन रुग्णेन शिरोऽभीक्ष्णं लुठ्यते, आहारो नाभिनन्द्यते, कूज्यते, तुद्यते, परिवर्तनमीह्यते, अल्पमल्पं किञ्चित् प्रभाष्यते च । अयम् अभिन्यासो ज्वरोऽसाध्यः** ( मानि. २३ )

**संप्राप्ती**–आमाच्या वृद्धीने प्रकुपित तिन्ही दोष उरःस्थानात व बुद्धि इंद्रिये व मनाला दुष्ट करून महा घोर असा हा ज्वर उत्पन्न करतात. मर्यादा ५ दिवस. याने रोग्याला दिसत नाही, ऐकू येत नाही, वास, स्पर्श, शब्द यांचा बोध होत नाही, हालचालीची इच्छा होत नाही, मात्र डोके सारखे हालते, कण्हतो, थोडे थोडे बोलतो, आहार घेत नाही, कूस बदलावी असे वाटते. हा अभिन्यासज्वर असाध्य आहे.

**अभिपन्न**–वि., **आक्रान्तः** ( सुउ. ४२.८९ ) ताब्यात घेतलेला, व्यापलेला.

**अभिप्रपन्न**–वि., **अभिमुखं प्राप्तम्** ( सुशा. ९.७ ) समोर आलेला, समोर असणारा,

**अभिप्राय**–पु., **अभ्यर्थनम्, भोजनादीच्छा, 'श्रद्धामभिप्रायेण परीक्षेत'** ( चवि. ४.८ )
भोजनादिकांची इच्छा, अन्नपानेच्छा, मागणी, ही अन्नाची इच्छा मागणीने परीक्षावी.

**अभिप्रेत**–वि., **निर्णीतं स्वीकृतं च यत्तत्** ( अहसू. १२.१३ )
निर्णय करून जे स्वीकारले आहे ते. ठरवून घेतलेले.

**अभिप्रेर्यमाण**–वि., **गतिमान्, प्रेरितः** ( सुशा. ३.४ )
गतियुक्त, प्रेरणा झालेला–केलेला.

**अभिप्लावन**–( परिव. ) न., **प्रक्षेपणम्, मिश्रीकरणम्** ( सुचि. ४.२८ ) त्यात टाकणे, मिश्रण करणे.

**अभिभव**–पु., **पराभवः** ( सुनि. ५.६ ) पराभव, पराजय.

**अभिभवन**–( परिव. ) न., **अभिभवः, कुट्टनम्** ( सुचि.२८.१९ ) कुटणे, चूर्ण–पिष्ट करणे.

**अभिमान**–पु., **अहंकारः** ( अहसू. १२.१३ )
अहंकार, गर्व, ताठा, अहंमन्यता.

**अभिमुख**–वि., **संमुखः** ( सुशा. ५.४५ )
सामोरा आलेला, समोर असलेला.

**अभिमृष्ट**–वि., **मर्दितम्** ( सुक. ४.१३ )
पायाखाली आलेला, चेपलेला, चुरडलेला.

**अभियात्**–वि., **गच्छत्** ( चनि. ६.६ ) जाणारा.

**अभियुक्त**–वि., **अनुष्ठानपरम्** ( अहसू. १२.७३ )
सतत अभ्यास करणारा. शास्त्रचिंतक.

**अभियोग**–पु., **सोत्साहः दीर्घः प्रयत्नः** ( चवि. ८.१४ )
उत्साहाने दीर्घकाळ केलेला प्रयत्न.

**अभिलाष**–पुं., **इच्छा** ( चनि. ७.७( २ ) इच्छा.

**अभिवाहिन्**–वि., **अभिवहनशीलम्** ( सुशा. ९.१३ )
नित्यवाही. नेहमी वाहणारा.

**अभिविधान**–न., **आनुगुण्येन अवस्थानम्** ( चवि. ८.७८ ) अनुकूल गुणाने असणे.

**अभिवृद्धि**–स्त्री., **विशेषरूपेण वृध्दिः** ( चनि. १.२१ )
अधिक वाढ, विशेष वाढ.

**अभिव्यञ्जक**–पु., **ज्ञापकः** ( सुसू. ४१.३ )
व्यक्त–स्पष्ट करून येईल असे स्वरूप. आपल्या वर्गाची ओळख पटविणारे दर्शक संबंध.

**अभिशङ्का**–स्त्री., **अभिषङ्गः, मनोभिषङ्गः, कामाद्यभिषङ्गः** ( सुउ. ३९.२१ )
उच्छृंखल विकारांचा मनाशी संबंध, उच्छृंखल कामविकाराचा संबंध.

**अभिशतक**–पु., **मिथ्याभिशंसजन्यरोग०, ऋषीणामाऽऽक्रोशाज्जातो रोगः** ( सुसू. २४.७ )
शापजनित. शापापासून झालेला. ऋषींच्या आक्रोशाने होणारा रोग.

**अभिशस्तक**–पु., **अभिशप्तकः** ( सुसू. २४.७ )
ऋषींच्या आक्रोशाने झालेला रोग.

**अभिशाप**–पु., **देवद्विजसिध्दादीनामभिशपनम्।** ( सुउ. ३९.२१ )
**शापः**, ( चचि. ३.१११–११२ ) **आगन्तुज्वरनिदान०**, ( चनि. १.३० ) **मन्त्रविशेषः** ( सुसू. ६.१९ ) देव ब्राह्मण सिद्ध इत्यादींचा शाप. आगंतु ज्वराचे कारण; विशेषमंत्र.

**–जज्वर**–परिव. पु., **रोग०, आगंतुज्वर०** ( चनि. १.३० )
देव ब्राह्मणादिकांचे शापापासून आलेला ज्वर, एक आगंतुज्वर.

**अभिषङ्ग**–पु., **भूतादिसंसर्गः** ( चचि. ३.१११–११२, ( चसू. २०४ ) भूतादिकांचा संपर्क–शरीर प्रवेश.

**–ज–ज्वर**–परिव. पु., **आगंतुज्वर०** ( चनि. १.३० )
**ग्रहाभिषंगाद् अकस्माद् हसितरुदिते भवतः।** ( असंनि. २.३७ )
भूतसंपर्कज ज्वर. यात एकदम हसणे रडणे होते.

**अभिषव**–पु., **आसुतकल्प०, मद्यम्** ( काखि. ३.३५ )
आसवांसारखा एक कल्प, मद्य. विरजण.

**अभिषवण**–न., **मिश्रणम्** ( चशा. ८.१७ ) मिश्रण.

**अभिषुक**–पु., **फल०, उत्तरापथिकं फलम्**, ( चचि.२९.६६ ) **'पिस्ता' इति केचित्, (अहको.)**
पिस्ता. एक पौष्टिक फळ. काबुल इत्यादी भागातील प्रसिद्ध फळ, यातून तेल निघते. गुण–गोड, जड, उष्ण, स्निग्ध, बलदायक, पौष्टिक, शुक्राला हितकर, वातघ्न, कफपित्त वाढवणारे. अंगुर असे ही म्हणतात. बदाम, पिस्ते, अक्रोड इ०

**" वातामाभिषुकाक्षोटमुकूलकनिकोचकः।**
**गुरूष्णस्निग्धमधुराः सोरुमाणा बलप्रदाः ॥**
**वातघ्ना बृंहणा वृष्याः कफपित्ताभिवर्धनाः।"** ( चसू. २७.१५७,१५८ )

**काबुलादौ प्रसिद्धः फलविशेषः, अभिषुरिति लोके।** ( सुसू.४६.१८६, उ; ) **स्नेहयोनिफलम्**–( १३.१०,) **अङ्कुर इति हाराणचंद्रः।**

**अभिषुत**–वि., **निषिक्तम्, मिश्रितम्** ( चशा.८.१७ )
**ऋत्विग्भिः स्नापितं पीडितम्** ( सुचि.२९.१० )
विरजण ( दही, आसव इ० सारखे ) मिश्रित, विरजण टाकलेले.

**अभिषूक**—पु., अभिषुकः ( अहृसू.६.१२० )
पहा 'अभिषुत', यज्ञकर्त्या ब्राह्मणांनी समन्त्रक दाबून चोळून प्रोक्षण केलेले.

**अभिषेक**—पु., संस्कार०, **अग्नौ विद्रुते लोहे निमेषाष्टकानन्तरं परिक्षिप्तं जलम् । द्रुते वह्निस्थिते लोहे विरम्याष्टनिमेषकम् । सलिलस्य परिक्षेपः सोऽभिषेक इति स्मृतः ॥**" ( र.८.५५ )
लोखंडाचा रस तयार झाल्यावर ८ निमेष थांबून पाणी टाकणे

**अभिष्टुति**—स्त्री., **स्तुतिः अभीष्टः स्तोत्रपाठः**
( चइ. १२.७८ ) स्तुति, इष्टसिध्यर्थ स्तोत्रपाठ करणे.

**अभिष्यण्ण**—त्र. वि., **अभिष्यन्दयुक्तम्, मेदःकफाभिव्याप्तम्** ( सुचि. ४०.४४ ) स्रावयुक्त. मेदकफाने व्यापलेले.
**द्रवप्रधानश्लेष्मविकारयुक्तम्** ( चसू. १३.५४ )
द्रवात्मक, कफविकारयुक्त.

**—गुद**—वि., गुदात्स्रावोऽभिष्यन्दते यस्य सः, अतिसारविकारयुक्तो वा । ( चसू.१३.५४ )
स्रावीगुद, किंवा अतिसारयुक्त गुद. गुदस्राव होत असलेला.

**अभिष्यण्णानन**—वि., **मुखात् स्रावोऽभिष्यन्दते यस्य सः अत्यधिकलालास्रावी वा अन्यश्लेष्मविकारी वा** ( चसू.१३.५४ ) ज्याच्या मुखातून स्राव होत आहे तो. खूप लाल गळणारे किंवा कफविकारयुक्त तोंड.

**अभिष्यन्द**—पु., **दोषधातुमलस्रोतःसु क्लेदः**
( सुसू. ४६.५१ )
दोषधातुमळ यांच्या स्रोतसातून होणारा स्राव.
**मूत्रनिस्यन्दः** ( सुचि. १२.१९ ) मूत्रस्राव.
**नेत्ररोग०, 'प्रायेण सर्वे नयनामयास्तु भवन्त्यभिष्यन्दनिमित्तमूलाः'** । ( सुउ. ६.५ )
**संख्यासंप्राप्तिः—वातजः, पित्तजः, कफजः, रक्तज इति चतुर्विधः** । ( मा )
**वातजः—निस्तोद-स्तम्भ-रोमहर्ष-संघर्ष-पारुष्य-शिरोभिताप-विशुष्कत्वादिवातजलक्षणानि नेत्रे भवन्ति** ।
( सुउ. ६.६ )
**नासानाहोऽल्पशोफता, शङ्खाक्षिभ्रूललाटास्यानां तोदस्फुरणभेदनानि, शुष्काल्पा दूषिका, अच्छं शीतमश्रु, चला रुजः कृच्छ्रान्निमेषोन्मेषणम्, जन्तूनां सर्पणमिव वेदना । अक्षि आध्मातमिव सूक्ष्मशल्यैः आचितमिव चाभाति । स्निग्धोष्णैश्च उपशमनम्** । ( असंउ. १८ )

**पित्तजः—दाहः प्रपाकः शिशिराभिनन्दः धूमायनं बाष्पसमुच्छ्रयः इति पित्तजलक्षणानि भवन्ति** ।
( सुउ. ६.७ )
**शोफो, वर्त्मनः बहिःश्यावता, अन्तःक्लेदः पीतोष्णमश्रु,रागपीताभदर्शनमक्ष्णः क्षारोक्षितत्वं क्षतत्वं च** ।
( असंउ. १८ )
**कफजः—उष्णाभिलाषः नेत्रगुरुता, अक्षिशोफः, उपदेहः, श्वैत्यमतिशैत्यम्, मुहुः पिच्छिलः स्रावः** ।
( सुउ. ६.८ )
**महान् कण्डुः, निद्रा, अन्नानभिनंदनं, सान्द्रस्निग्धबहुश्वेतपिच्छावद्दूषिकाश्रुता भवति** ।
( असंउ. १८ )
**रक्तजः—"ताम्राश्रुता लोहितनेत्रता च । राज्यः समन्तादतिलोहिताश्च । पित्तस्य लिङ्गानि च यानि तानि रक्ताभिपन्ने नयने भवन्ति** ।" ( सुउ. ६.९ )
**अश्रुराजिदूषिका, शुक्लमण्डलदर्शनानां रक्तत्वं तथा च पित्ताभिष्यन्दलक्षणानि** । ( असंउ. १८ )
**अयं साध्यो नेत्ररोगः** ।

**डोळे येणे**—बहुधा डोळ्याचे सर्व रोग डोळे आल्यामुळे होतात. **संख्या संप्राप्ति**—वातज, पित्तज, कफज व रक्तज असे चार प्रकार.

**वातज**—टोचणी, ताठरपणा, रोमांच, करकरणे, खरखरीतपणा, डोके तापणे, डोळे कोरडे असणे, सूज थोडी असणे, नाक फुगणे, शंख, डोळे, भुवई, कपाळ, तोंड, यात टोचणी, स्फुरण व फोडल्यासारखी वेदना डोळ्याला सुकट व थोडा मळ, स्वच्छ थंड आसू, वेदना अस्थिर, कष्टाने डोळ्यांची उघडझाप, डोळ्यातून जणु किडे वळवळतात अशी वेदना, डोळा फुगल्यासारखा, त्यात बारीक कुसळे अडकल्यासारखा भास आणि स्निग्ध व उष्ण उपायांनी बरे वाटणे.

**पित्तज**—दाह, पापण्यांना बाहेरून काळसरपणा, आत स्राव, अश्रु पिवळे उष्ण व फार येणे, सूज, धूर निघाल्यासारखे वाटणे, डोळा पिकतो, त्यात क्षार घातल्यासारखी वेदना, जखम, लाली, पिवळे दिसणे आणि डोळ्याला व रोग्याला थंडाव्याची इच्छा.

**कफज**—डोळे जड, सूज, घाण, पांढरेपणा अतिथंडावा. मधून मन बुळबुळीत स्राव, [illegible]
झोप, अन्नाचा द्वेष, दाट स्निग्ध पां[illegible]
पुष्कळ अश्रु येणे व उष्ण पदार्थांची

**रक्तज**—डोळे लाल, अश्रु लाल, डोळ्यांभोवती अति लाल शिरा उमटणे, पित्ताची बाकीची चिन्हे व घाण नेत्रातील शुक्र मंडलही लाल व सर्व दृश्ये लाल दिसणे ही लक्षणे होतात. हा रोग साध्य आहे.

**–नाशिनी**–स्त्री., **सिध्दौषधि०, नेत्राभिष्यन्दनाशिनी वर्तिः** ( र. २३.३२ )
एक सिद्ध तयार औषधि. नेत्ररोगनाशक औषधी कांडी.

**अभिष्यन्दन**–वि., **अभिष्यन्दकरं दध्यादि** ( अहृसू. १३.१८ )
जलांश अधिक करणारे, स्राववर्धक दही इ०

**अभिष्यन्दमान**–वि., **आपूर्यमाणम्** ( चनि. ५.९ )
व्याप्ति वाढवणारे, त्वचेवर खूप पसरणारे ( कुष्ठ. )

**अभिष्यन्दिन्**–वि., **दोषधातुमलस्रोतसां क्लेदप्राप्तिजनकम्** ( सुसू. ४६.५० )
दोषधातुमलस्रोतसात आर्द्रता, क्लिन्नता, क्लेद, स्राव निर्माण करणारे.
**गुण०, उपलेपकारी** ( सुचि. ४०.३१ )
उपलेप करणारे. चिकट स्राव करणारे.
**आभिमुख्येन स्यन्दयति मालिन्यात् स्रोतसां स्रुतिरूपं श्लेष्माणं करोति** ( अहृसू. ६.२५ )
स्रोतसे दोषांनी मलिन–दुष्ट झाल्यामुळे तेथे स्राव होतो. स्रावरूपी कफ होतो.

**अभिष्वङ्ग**–पु., **आसक्तिः** ( असंशा. ५.१९ )
आसक्ति.

**अभिसन्न**–वि., **अभितः सर्वथा अवसन्नम्** ( चचि. ८.५७ )
सर्व बाजूंनी खाली गेलेले, सर्व धातूपधातुअवयवांचा क्षय म्हणजे सर्व बाजूंनी क्षीण होत असलेले शरीर.

**अभिसंप्लव**–पु., **आत्मनोऽभिमतः अनात्मन्यभिसंप्लवः । आत्मनोऽनात्मगोचरतया आत्मबुध्दिरित्यर्थः** ( चशा. ५.१० ) आत्मबुद्धी.

**अभिसर**–वि., **आनेता, प्राणानामभिसरः प्राणानामानेता,** ( चसू. २९.५ )
आणणारा. प्राण आणणारा, रक्षण करणारा.

**अभिहत**–न., **अभिघातः** ( सुसू. ४२.९८ ) ( २ )
मारणे, आघात, मार लागलेला भाग, आघातजन्य सूज.

**अभिहनन**–न., **शस्त्रादिभिस्ताडनम्** ( चनि. ७.७ ( २ )
शस्त्रादिकांनी मारणे.

**अभिहुत**–वि., **ऋत्विग्भिरग्नौ प्रक्षिप्तम्** ( सुचि. २९.१० )
याज्ञिकांनी अग्नीमध्ये टाकलेले द्रव्य. ( समिधा, घृत इ० )

**अभीराजि**–पु., **कीट०, अनेन दष्टे सति वातप्रकोपः वातरोगाश्च भवन्ति ।** ( सुक. ८.५–८ )
एक किडा, हा चावला तर वातप्रकोप होऊन वातरोग होतात.

**अभीरु**–स्त्री., **वनस्पति०, शतावरी** ( सुउ. ४२.७० )
शतावरी.

**अभीक्ष्ण**–अ., **पुनः पुनः, अनवरतम्** ( चसू. ८.६ )
पुन्हां पुन्हां, अखंड. सातत्याने.

**अभीष्ट**–पु., **तिलकः** ( रा. १०. २६७ )
एक रेचक वनस्पति.

**अभेद्य**–न., **हीरकम्** ( ध. ६.५६. ) हिरा.

**अभेषज**–न., **यदौषधाद् विपरीतं तत् । विपरीतं नाम रोगजननलक्षणार्थकारि । 'अभेषजमिति ज्ञेयं विपरीतं यदौषधात् ।** ( चचि. १.१५ ) **अभेषजं द्विविधं–बाधनं सानुबाधनं च** ( चचि. २.५ )
जें औषध नाही. शरिरात रोगोत्पादक. अभेषज प्रकार दोन-एक ताबडतोब बाधक व दुसरा दीर्घ कालाने बाधक होणारा.

**अभ्यक्त**–वि., **लिप्तम्** ( सुचि. ३४.१२ ) माखलेले.
**–सन्निभ**–वि., **तैलस्निग्धकल्पः,** ( चइ. ८.९ )
तेलासारखे स्निग्ध. जणूं कांही तेल तूप लावल्यासारखे.

**अभ्यङ्ग**–पु., **उपक्रम०, शरीरे तैलविमर्दनम् । 'तथा शरीरमभ्यङ्गाद् दृढं सुत्वक्च जायते ।'** ( चसू. ५.८६ )
**गुणाः–अभ्यङ्गो मार्दवकरः कफवातनिरोधनः ।**
**धातूनां पुष्टिजननो मृजावर्णबलप्रदः ।**
( सुचि. २४.३०. ) **स्नेहस्य सिरामुखादिभिः शरीरसन्तर्पणकालं केचिदत्र पठन्ति ।**
**"रोमान्तेष्वनुदेहस्य स्थित्वा मात्राशतत्रयम् ।**
**ततः प्रविशति स्नेहश्चतुर्भिर्गच्छति त्वचम् ॥**
**रक्तं गच्छति मात्राणां शतैः पञ्चभिरेव तु ।**
**षड्भिर्मांसं प्रपद्येत मेदः सप्तभिरेव च ॥**
**शतैरष्टाभिरस्थीनि मज्जानं नवभिर्व्रजेत् ।**
**तत्रस्थान् शमयेद्रोगान् वातपित्तकफात्मकान् ॥"**
( सुचि. २४.३०–३४ ड. )
**अभ्यङ्गनिषेधः–**
**'केवलं सामदोषेषु न कथंचन योजयेत् ।**
**तरुणज्वर्यजीर्णी च नाभ्यक्तव्यौ कथंचन ॥**

"तथा विरिक्तो वान्तश्च निरूढो यश्च मानवः ।
पूर्वयोः कृच्छ्रता व्याधेरसाध्यत्वमथापि वा ॥
शेषाणां तदहः प्रोक्ता अग्निमान्द्यादयो गदाः ।
सन्तर्पणसमुत्थानां रोगाणां नैव कारयेत् ॥"
( सुचि.२४,३५-३७ )

**अभ्यंग**–शरिराला तेलाचे मर्दन, तेल अंगात जिरवणे. याने त्वचा व शरीर बळकट होते व त्वचा चांगली नितळ रहाते. गुण–मृदुता, शरीर–शुद्धि, वर्ण व बलप्रद आहे, धातूंची पुष्टि व कफवाताचा नाश होतो. स्नेहनाचा शरिरात जिरण्याचा काल–त्वचेवर केसांच्या मुळाशी अभ्यंगाचा स्नेह तीनशे मात्रा ( लहान अक्षर मोजण्या इतका काळ म्हणजे एक मात्रा ) काल रहातो. चारशे मात्रा कालाने त्वचेत, पाचशे मात्रा कालाने रक्तात, सहाशे नंतर मांसात, सातशे नंतर मेदात, आठशे नंतर अस्थीत, नउशे नंतर मज्जेत समाविष्ट होऊन तेथले वातपित्तकफ-संबंधी रोग नष्ट करतो.

**निषेध**–केवल साम दोष, अजीर्णी, नवज्वरी, रेच झालेला, वांत्या व बस्तीविधि झालेला यांना अभ्यंग करू नये. पहिले दोन विकार म्हणजे आमदोष आणि अजीर्ण यांत अभ्यंग केल्यास ते रोग कष्टसाध्य किंवा असाध्य होतात. व इतरांमध्ये केल्यास अग्निमांद्यादि रोग होतात. पौष्टिक खाद्यपेय सेवनाने झालेल्या रोगात अभ्यंग करूच नये.

**अभ्यञ्जन**–न., अभ्यङ्गः ( चसू. १.८७, ) **तैलम्** ( ध. ६.१२५ ) **अञ्जनप्रकार०** ( असंउ. १४ ) **( प्रत्यंजन' पाठः इंदु. )**
अंगाला तेल लावणे. तेल, अंजनाचा एक प्रकार

**–यन्त्र**–न., **यन्त्र०, अभ्यञ्जनयन्त्रं षडङ्गुलं बस्तियन्त्राकारं मुखतोऽकर्णिकं मूलमुखयोरङ्गुष्ठकलायप्रवेशस्रोतस्कम्** ( असंसू. ३४.१३. )
एक यंत्र; बस्तीच्या यंत्राच्या आकाराचे; नळी सहा अंगुळे लांब, मुळात आंगठ्या एवढे आणि तोंडाशी वाटाण्या एवढे छिद्र असलेले यंत्र.

**अभ्यनुज्ञा**–स्त्री., **निग्रहस्थान०, 'अभ्यनुज्ञा नाम सा यः इष्टानिष्टाभ्युपगमः'** ( चवि. ८.६२, ) **मतानुज्ञा च "स्वपक्षदोषाभ्युपगमात् परपक्षदोषप्रसङ्गः** ( गौ. न्या. सू. ५.२.२१ )
आपला दोष कबूल केला म्हणजे दुसऱ्या पक्षाचा दोषारोप लादून घेणे.



**अभ्यन्तरयातनेत्र**–वि., **रोगलक्षण०, कोटरान्तः-प्रविष्टाक्षिगोलकः** ( सुउ. ५६.११) )
ज्याचे डोळे खोल गेले आहेत असा.

**अभ्यन्तरायाम**–पु., वातरोग०, **अन्तरायामः** ( चचि.२८.३५ )

**" अभ्यन्तरं धनुरिव यदा नमति मानवः ।
तदास्याऽभ्यन्तरायामं कुरुते मारुतो बली "**

( सुनि. १.५६ ) शरीर आतून धनुष्यासारखे वाकडे करणारा वातरोग.

**अभ्यर्दित**–वि., **पीडितम्** ( सुउ. ४९.९ )
पीडित. त्रस्त.

**अभ्यवपात**–पु., **परमार्थतोऽनात्मनि ममता** ( चशा. ५.१० ) स्वतःवर खरोखर ममता नसणे.

**अभ्यवहरण**–परिव. न., **भोजनम्** ( सुचि. २३.४ )
आहार, भोजन, जेवण करणे.

**अभ्यवहार**–पु., **आहारः** ( चसू. २५.४०. )
भोजन, आहार.

**अभ्यवहार्य**–वि., **अभ्यवहर्तुं भोक्तुं योग्यम् , भक्षणीयम** ( चनि. ४.५० ) खाण्याचे–खाण्यासारखे पदार्थ.

**अभ्यवहृत**–वि., **भक्षितम्** ( असंसू. १० )
खाल्लेले अन्न, घेतलेला आहार.

**अभ्यसूया**–स्त्री., **छिद्रान्वेषितया परगुणेषु दोषारोपणम्** ( सुसू. १.२५-३ ) दुसऱ्याचे व्यंग दाखविण्याकरितां त्याच्या गुणांवर दोषारोप करणे.

**अभ्यागमन**–**अभिव्यक्तिः** ( चनि.१.२१ )
प्रकट करणे.

**अभ्यास**–पु., **सततक्रिया, भावाभ्यसनम् शीलनम् ,** ( चसू. २६.३० अहसू. १२.५५) **सामीप्यम्** ( सुनि.४.५ )
नियमाने क्रिया करणे. सराव करणे. संवय करणे. पुनः पुन्हा करणे. संनिध–जवळ असणे.

**अभ्युग्र**–वि., **अभ्युद्गतम्** ( चइ. १२.४३ )
स्पष्ट दिसत असलेले ( अरिष्ट. )

**अभ्युदय**–पु., **स्वर्गः** ( चसू. ११.२७. ) **सुखस्य हेतुः, सुखागमः** ( सुसू. ३५.३७ )
स्वर्ग, ( सुखाचा हेतु, सुख प्राप्त होणे. )

**अभ्युदीरण**–परिव.- न., **प्रकोपनम् , वर्धनम्** ( सुसू. १२.१७ ) दोषांचा प्रकोप होणे. दोष वाढणे.

**अभ्युपगम**–पु., **गुरुवाक्यादीनामङ्गीकारः** ( सुसू. ६.२० )
गुरूंनी सांगितलेल्या वाक्यादिकांचा अंगीकार करणे.

**–सिद्धान्त**–पु., **अभ्युपगमसिद्धान्तो नाम सः, यमर्थमसिद्धमपरीक्षितमनुपदिष्टमहेतुकं वा वादकालेऽभ्युपगच्छन्ति भिषजः ।** (चवि. ८.३७,) **अपरीक्षिताभ्युपगमात् तद्विशेषपरीक्षणम् अभ्युपगमसिद्धान्तः ।** ( गौ. न्या. सू. १.१.३१ )
ज्याला कारण दिसत नाही. जो सिद्ध केला गेला नाही, ज्याची तज्ज्ञांनी परीक्षा केली नाही व जो आगमात शास्त्रकारांनी सांगितला नाही असा जो सिद्धांत वैद्य वादाचे वेळी पुढे मांडतात तो.
जो सिद्ध झाला नाही, परीक्षिला गेला नाही, कुणी सांगितला नाही अशा मुद्याचा वाद प्रसंगी आश्रय करण्याची वैद्यांची पद्धति म्हणजे अभ्युपगम सिद्धांत.

**अभ्युपपत्तृ**–पु., **अकम्पानुकम्पया अनुग्रहीता** ( चसू. ८.१८ )
संकटात सापडलेल्यांचा रक्षणकर्ता.

**अभ्युपाय**–पु., **अमोघः उपायः, सुष्ठु साधनम्** ( असंसू. २२.१६ )
रामबाण उपाय. व्यर्थ न जाणारा उपचार. चांगले साधन.

**अभ्र**–न., **वनस्पति०, मुस्ता** ( सुउ. १०.४ )
**मेघः** ( सुक. ७.४१ ) **अभ्रकम्, महारसेष्वेकम् ।** ( र. २.१ )
नागरमोथा. मेघ. अभ्रक. एक महारस.

**–कदली**–स्त्री., **वनस्पति० वन्यकदली, वर्षणात् प्रागेव मेघानां गर्जनाशब्देनापीयमङ्कुरिता भवति, कोंकणे प्रसिद्धा** ( र. १९.३९ )
रानकेळ. हिला पावसाळ्यापूर्वीच ढग आले असता त्यांच्या गर्जनेने सुद्धा अंकुर फुटतात. कोकणात प्रसिद्ध.

**–काल**–पु., **वर्षाऋतुः, श्रावणभाद्रपदौ** ( चशा. २.४५ )
वर्षाऋतु. श्रावण भाद्रपद हे दोन महिने.

**–ग्रास**–पु., **पारदसंस्कार०** ( र. १.३१ )
भुकेलेल्या पाऱ्यात त्याच्या ह्र्हूँ अभ्रक घालून शास्त्रोक्त विधीने तो अभ्रकाचा घास जिरवितात.

**–पटव**–न., **अभ्रकम्** ( ध. परि. ६.३–४ )
अभ्रक.

**–संप्लव**–पु., **मेघानां सर्वतोगमनम्** (सुउ. ७.२१)
मेघांचा आकाशात सर्वत्र संचार.

**–सार**–पु., **वनस्पति० कर्पूरः** ( रा. १२.५६ )
कापूर.

**अभ्रक**–न., **महारस० तद्गुणाः–स्निग्धं, प्रज्ञाकरं, जरानाशनं, वृष्यम्, आयुष्यं, बल्यं, रुच्यं, दीपनं, पाचनं, वातपित्तघ्नं, क्षयघ्नं, सकलगदघ्नं च ।** ( ध. परि. ६.३–४. )
महारसांपैकी एक. अभ्रक. गुण–स्निग्ध, बुद्धिवर्धक, शुक्र, आयुष्य, बल, रुचि यांना हितकर; पाचक, दीपक, वार्धक्य, क्षय, सर्वरोगनाशक, वातपित्तनाशक.

**अभ्रङ्कष**–वि., **अत्युच्चम्** ( अहृसू. ३.३३ )
अतिशय उंच. ढगांना किंवा आकाशाला भिडणारे.

**अभ्योष**–पु., **काण्डस्थः अपक्वो भृष्टो यवः** ( असंसू. १० )
झाडावरचा भाजलेला जव. जवाचा उळा. हुळा.

**अमत्र**–न., **शरावस्थाल्यादिपात्रम्** ( चइ. १२.३९., ) ( असंनि. ५–९. )
परळ, थाळी इत्यादी पात्र.

**अमत्रक**–न., **अमत्रम्** ( कासि. १ ) भांडे.

**अमर**–पु., **देवः** ( सुचि. २८.२६ ) देव.
**खनिज०, पारदः** ( रा. १३.४२ ) पारा.
**वनस्पति०, देवदारुः** ( सुचि. ३७.११ ) देवदार.

**–कण्टिका**–स्त्री., **वनस्पति०, शतावरी** ( रा. ४.४३७ ) शतावरी.

**–काष्ठ**–न., **देवदारुः** ( सुउ. ११.८ ) देवदार.

**–गुरु**–पु., **धन्वन्तरिः** ( सुनि. ९.३ ) धन्वन्तरी.

**–तरु**–पु., **देवदारुः** ( असंचि. २.३ ) देवदार.

**–दारु**–न., **देवदारुः** ( ध. १.७७ ) देवदार.

**–प्रभु**–पु., **इन्द्रः** ( चसू. १.२२ ) इंद्र.

**–वर**–पु., **देवश्रेष्ठः** ( सुसू. १.३ ) देवात श्रेष्ठ; इंद्र.

**–वरायुधसाह्वय**–पु., **वनस्पति०, वज्रकन्दः** ( सुचि. १७.४१ ) वज्रकंद; रताळू.

**अमरा**–स्त्री., **वनस्पति०, निर्गुण्डी** ( असंउ. ८ )
निगडी. निर्गुंडी.
**इन्द्रवारुणी** ( रा. ३.३७ ) इंद्रावण, कवंडळ.
**मूर्वा** ( रा. ३.१० ) मोरवेल.
**नदीवटः** ( रा. ११.११६ ) वड.
**अपरा, गर्भस्य नाभिनाडीप्रतिबध्दा 'अमरा' इति लोके । चक्र०,** ( चशा. ६.२३ ) ( **'अपरा' द्रष्टव्या** ) 'अपरा' पहा. वार.

**अमराजरा**–स्त्री., **कुमारी** ( रापरि. ५.१० ) कोरफड.

**अमरार्त**–वि., **देवगृहीतम्** ( चचि. ९.६८ )
देवांनी पछाडलेला–धरलेला.

**अमराह्व**—पु., वनस्पति०, देवदारुः ( सुउ. ५२.१४ ) देवदार.

**अमरी**—स्त्री., मूर्वा ( रा. ३.१० ) मोरवेल.
**कृष्णपुष्पा, निर्गुण्डी** ( र. २३.१९ ) निगडी, निर्गुंडी.
**नीलदूर्वा** ( र. २३.१९ ) हिरवी-निळी दूर्वा.
**आकाशवल्ली, तन्तुमयीयं निष्पत्रा वृक्षोपर्येवोत्पद्य तिष्ठति, 'अमरवेल' इति लोके** ( र. २३.१९ )
अमरवेल. पाने नसलेली पिवळ्या धाग्यांची झाडांवर उत्पन्न होऊन वाढते.

**अमर्त्य**—वि., **अमानुषम्** ( चचि. ९.१७ )
अमानुष. माणसाच्या हातून न घडणारे.

**अमर्ष**—पु., **अक्षान्तिः, असहिष्णुता** ( चचि. ९.१२ ) ( चनि. ७.८ ) क्रोध, मत्सर, असहिष्णुता.

**अमर्षण**—वि., **असहिष्णुः, अक्षमी** ( सुशा. ४.९० )
सहनशक्ति नसलेला. मत्सरी, द्वेषी, चिडखोर.

**अमलभास्कर**—पु., **यस्मिन् दिनभागे अमलः प्रबलरश्मिर्भास्करः स मध्याह्नः** ( चसू. १३.१९ )
ज्या माध्यान्ही ( दिवशी ) स्वच्छ चटका घेणारे कडक ऊन्ह पडले आहे तो वेळ.

**अमला**—स्त्री., **सातला** ( ध. १.२३८ ) शिकेकाई.

**अमात्रा**—स्त्री., **मात्राया हीनत्वमाधिक्यं वा** ( असंसू. ११.१० ) प्रमाणापेक्षा कमी किंवा अधिक.

**अमात्रावत्त्व**—न., **मात्राया हीनत्वमधिकत्वं वा** ( चवि. २.७ ) प्रमाणापेक्षा न्यूनत्व किंवा अधिकत्व.

**अमात्राशन**—न., **अशनस्य हीनताऽऽधिक्यं वा** ( असंसू. १०.३४ ) जरूरीपेक्षा कमी किंवा अधिक आहार करणे.

**अमानुषोपसर्गप्रतिषेध**—पु., अध्याय० ( सुउ. ६०.१ )
एक अध्याय. ज्यांत भूतपिशाच इ० बद्दल माहिती ( विकार उपचार इ० ) दिली आहे तो.

**अमिलातक**—पु., **वनस्पति०, राजतरणी** ( रा. १०.२४६ )
एक सुगंधी फुलांची वनस्पती, मोठी शेवंती.

**अमूर्तत्व**—न., **अदृश्यत्वम्** ( चसू. २०.१२ )
आकार नसलेले. अदृश्य.

**अमृणाल**—न., **उशीरम्** ( चसू. ३.२६ ) काळा वाळा.
**लामज्जकम्** ( ध. ३.८६. ) वाळा.

**अमृत**—न., **समुद्रमन्थनोद्भूतमृत्युहरद्रव्य०** ( सुचि. १५.६ )
समुद्रमंथनापासून जे मृत्युहर द्रव्य उत्पन्न झाले ते.
**जरादिहरम्** ( चचि. १.७८ ) जरा-वार्धक्यहर.
वि., **अमृतमिव दोषप्रकोपस्याकरणात्** ( सुसू. ड ४५.३ )
अमृत जसे दोष करीत नाही; तसे जे दोष करीत नाही ते.

**—कन्दा**—स्त्री., **गुडूची** ( ध. १.५ ) गुळवेल.

**—घृत**—न., **सिद्धघृत०, तद्गुणाः—परं विषसंशमनम्, मृतं संजीवयेत्** ( चचि. २३.२४२-२४९ ) ( सुक. ६.१२.१३ )
विषशमनाचे उत्कृष्ट कार्य करणारे सिद्ध तूप.
**घृतम्**—( ध. ६.१४४. रा. १५.२०२ ) तूप.
**वनस्पति०, गुडूची** ( र. १८.२१४ ) गुळवेल.
**पारदः** ( रा. १३.४१ ) पारा.
**विषम्, वत्सनागाख्यम्** ( र. १२.६९ ) बचनाग.
पु., **वाराहीकन्दः** ( रा. ७.१३५ ) डुक्करकंद.
**मकुष्ठकः** ( रा. १६.१४५ ) मटकी-मठ

**—प्राशघृत**—न., **सिद्धघृत०** ( चचि. ११.३५-४३ )
एक सिद्ध घृत.

**—फल**—न., **वनस्पति०, आमलकम्** ( चचि. ७.१४७ )
आवळा.
पु., **वनस्पति०, पटोलम्** ( ध. १.५० ) पडवळ.

**—फला**—स्त्री., **द्राक्षा** ( रा. ११.७४ ) द्राक्ष.

**—फलाख्य**—न., **पारे(ले)वतम्** ( रा. ११.८८ ) खजूर.

**—रसपाक**—पु., **योग० भल्लातकघृतप्राशः** ( असंउ. ४९ ) बिब्याने सिद्ध केलेले एक घृत.

**—रसा**—स्त्री., **द्राक्षा** ( रा. ११.७६ ) द्राक्ष.

**—लता**—स्त्री., **गुडूची** ( ध. १.१ ) गुळवेल.

**—वटी**—स्त्री., **सिद्धौषधि०, इयमजीर्णश्लेष्मवातघ्नी** ( र. १६.१६०-१६१ )
अजीर्ण आणि कफवातनाशक वटी.

**—वल्ली**—स्त्री., **गुडूची** ( चचि. १.७७ ) गुळवेल.

**—संभवा**—स्त्री., **गुडूची** ( ध. १.३ ) गुळवेल.

**—स्रवा**—स्त्री., **वनस्पति०** रुदंती, रुद्रवंती.
**"ज्ञेयाऽमृतस्रवा वृक्षरुहाख्या तोयवल्लिका। घनवल्लीसितलतानामभिः शरसंमिता ॥"**
**गुणाः—ईषत्तिक्ता पथ्या-रसायनी विषघ्नी व्रण-कुष्ठ-आम-कामला-श्वयथुघ्नी, इयं चित्रकूटप्रदेशे प्रसिद्धा** ( रा. परि. ३.४५. )
गुण— थोडी कडू, पथ्यकर रसादि धातूंची वृद्धि करणारी, विषनाशक, व्रण, कुष्ठ, आम, कावीळ, सूजनाशक. ही चित्रकूटात प्रसिद्ध.
स्त्री., **रुदन्ती.** ( रा. परि. ५.१५ ) रुदन्ती. रुद्रवंती.

**—हस्त**—वि., **पताकादिचिह्नांकितपाणिकः, अनामिकाधःस्थरेखाङ्कः** ( र. ७.२९. )

ज्या हातावर पताका इत्यादी चिन्हे असतात तो हात. ज्याच्या अनामिकेच्या (शेवटून दुसऱ्या बोटाच्या) खाली रेषांचे चिन्ह असते तो.

**अमृतक**–पु., **वनस्पति०, आम्रातकः** (असंसू. २६.६) अंबाडा, चाकवत.

**अमृतका**–स्त्री., **गुडूची** (चसू. १४.३१) गुळवेल.

**अमृता**–स्त्री., **वनस्पति०, गुडूची** (सुसू. १२.२३.) (चसू. २५.४०) गुळवेल.

**हरीतकी,** (ध. १.२०५) हिरडा.

**आमलकम्** (रा. ११.३२५) आवळा.

**इंद्रवारुणी** (रा. ३.३७३) इंद्रावण, कवंडळ.

**तांबूली** (ध. परि. ३.१) विड्याच्या पानांची वेल.

**दूर्वा** (रा. ८.२२७) दूर्वा.

**द्रष्टव्या दूर्वा, दूर्वाभेदः, नीलदूर्वा** (रा. ८.२२६) हिरवी दूर्वा.

**आसुत०, सुरा** (रा. १४.३०२) दारू.

**खनिज०, तुवरी, सौराष्ट्री** (ध. ३.१०५) तुरटी.

**अमृतासङ्गः खर्परिकातुत्थकम्** (ड. सुक. १.५४) कलखापरी. मोरचूद.

**–कन्द**–पु., **वनस्पति०, गुडूचीकन्दः** (र. ११.५७) गुळवेलीचा कंद.

**–क्षार**–पु., **गुडूचीक्षारः** (सुउ. ४१.३८) गुळवेलीचा क्षार.

**–द्वय**–न., **गुडूची हरीतकी च** (सुचि. ३७.२०) गुळवेल आणि हिरडा.

**–फल**–पु., **पटोलः** (ध. १.५०) पडवळ, कडू पडवळ.

**–सङ्ग**–न., **तुत्थम्** (चसू. ३.१०) मोरचूद.

**मयूरतुत्थम्** (चचि. १४.५५) मोरचूद.

**कर्परिका अमृता गुडूची आसङ्गो रसाञ्जनम्** (असंउ.३०) कलखापरी, मोरचूद, गुळवेल, रसांजन.

**–संज्ञ**–पु., **खर्परिकातुत्थम्** (चचि. ७.११४) कलखापरी, मोरचूद .

**अमृताख्यघृत**–न., **सिद्धघृत०, इदं विषबाधायां हृदयरक्षाकरम्** (सुक. १.७९–८०.) विषाची बाधा झाल्यावर द्यावयाचे सिद्ध तूप. हृदयाचे रक्षक.

**अमृतागम**–पु., **अमृतं गुणः, तदुत्पत्तिः** (चचि. १. ३.११.) गुणांची उत्पत्ती.

**अमृताद्यतैल**–न., **सिद्धतैल०, इदमुन्मादादिहरं वातरक्तादिहरं च** (चचि. २८.१५७) (चचि. २९.१०३–१०९) गुळवेल इत्यादींनी सिद्ध केलेले तेल. उन्माद, वातरक्तादि विकार नाशक.

**अमृतार्णव**–पु., **सिद्धौषधि०,** (र. १८.१८५–८८.) एक सिद्ध औषधि.

**अमृतोद्भव**–वि., **अमृतेन सहोद्भवो यस्य** (सुनि. १.३) अमृतासह उत्पन्न झालेले.

न., **तुत्थम्** (रा. १३.२०५) मोरचूद.

**(अमृतोद्भवा)** स्त्री. **ताम्बूली** (ध. ३.१.) विड्याचे पान. विड्याच्या पानांची वेल.

**अमोघा**–स्त्री., **वनस्पति०, पाटला** (चसू. ४.१८) पाडळ.

**विडङ्गम्** (ध. २.११) वावडिंग.

**आमलकी** (चसू. ४.१८) आवळकाठी.

**लक्ष्मणा** (चसू. ४.१८) पांढरी भुईरिंगणी.

**अमोह**–पु., **मोहाभावः, निश्चिन्तमनस्कता** (सुसू. ३४.१४) मोह नसणे, निश्चिंत मन असणे.

**अम्बर**–न., **वस्त्रम्** (सुचि. ३०.७) वस्त्र.

**आकाशम्** (सुचि. ३५.२७) आकाश.

**अभ्रकम्** (रा. १३.२) अभ्रक.

**–धारण**–न., **वस्त्रधारणम्** (चसू. ५.९५) अंगावर वस्त्र घेणे.

**–पीयूष**–न., **विष्णुपदामृतम्** (शा. १.५.४९) विष्णूच्या पायाचे अमृत. आकाशातील अमृत, शुद्ध हवा.

**अम्बष्ठका**–स्त्री., **वनस्पति०, अम्बष्ठा** (ध. ३.११६) पहाडमूळ.

**अम्बष्ठकी**–स्त्री., **वनस्पति०, पाठा** (ध. १.७०) पहाडमूळ.

**अकर्णविद्धा** (चक्र. चसू. ४.९) पहाडमूळ.

**अम्बष्ठा**–स्त्री., **वनस्पति०, पाठा** (चचि. १५.११३) पहाडमूळ.

**पाठा मयूरशिखाख्या** (अहसू. १५.४०) मयूरशिखा. मोरशिखा.

**यूथिका** (रा. १०.२५०) जुई.

**क्षुद्राम्लिका** (रा. ५.४४) चुका.

**महाकरञ्जः** (ध. ५.११०) मोठा करंज.

**माचिका, 'साकूर' इति लोके** (उ. सुचि.११.१०) अंबिका–'अंबष्ठा' पहा.

**'मोहवा' इति लोके, 'सूक्ष्मपत्रा' चाङ्गेरी, 'अम्बाडा 'अम्बिका'** (र. १०.८०–८१)

पद्यते । (चसि. १२.४२;) अन्यच्च पीनो देवदत्तो दिवा न भुङ्क्ते अर्थाद्रात्रौ भुङ्क्ते ।

जे न सांगितलेले अर्थावरून समजते ते. जसे–रात्री दही खाऊ नये असे म्हटले पण सांगितलेले नसताही "दिवसा दही खावे" हे अर्थावरून समजते. तसेच 'पुष्ट देवदत्त दिवसा जेवत नाही' असे म्हटल्यावर 'अर्थातच तो रात्री जेवतो' हे अर्थावरून समजते.

**अर्थाभास**–वि., छलभेद० अर्थवदिव आभासते इति; 'वाग्वस्तुमात्रमेव,' (चवि. ८.५६)

अर्थाचा आभास करणारे. निरर्थक बोलणे.

**अर्थिन्**–वि., याचकः (चचि. २४.२०)

याचक, मागणारा.

**अर्थ्य**–वि., अर्थादनपेता, अर्थेन अप्रधानेन मध्यमस्थानीयेन युक्ता । (असंसू. ३) अर्थ न सुटलेली.

**अर्दन्**–न., (परिव०) हिंसा, प्रपीडनम् (सुनि. १.६९)

त्रास. छळ. मार.

**अर्दित**–पु., न., रोग०, अशीतिवातविकारेष्वेकः (चसू. २०.११)

मध्यममार्गजो वातव्याधिः (चसू. ११.४९)

'एकायामः' इति अपरे (अहनि. १५.३७)

सामान्यरूपम्–मुखं जिह्मं करोति (चसू. २०.११)

संप्राप्तिः–प्रकुपितो वायुः शिरोनासौष्ठचिबुकललाटेक्षणसन्धिगः सन् मुखमर्दयित्वा मुखार्धं ग्रीवां च वक्रीकृत्य अर्दितं जनयति (सुनि. १.६९)

पूर्वरूपाणि–रोमहर्षः वेपथुः आविलनेत्रता वायोरूर्ध्वं प्रसर्पणम् त्वचि स्वापः तोदः मन्याग्रहः हनुग्रहश्च (सुनि. १,७१)

लक्षणम्–उक्तं हसितमीक्षितं वायुर्वक्रीकरोति । शिरःकम्पः, वाक्सङ्गः, स्तब्धनेत्रता, दन्तचालः, स्वरभङ्गः, श्रुतिहानिः, क्षवग्रहः, गन्धाज्ञानं, स्मृतेर्मोहः, सुप्तस्य त्रासः, निष्ठीवस्य पार्श्वतो गमनम्, एकस्याक्ष्णः निमीलनम्, जत्रोरूर्ध्वं शरीरार्धे अधरे वा तीव्रा रुजो जायन्ते (असंनि. १५)

चरके तु मुखार्धवच्छरीरार्धव्यापकोऽर्दितः पठितः (चचि. २८.३८)

तस्य संप्राप्तिः–अतिवृद्धो वायुः शरीरार्धमेकं प्रपद्य बाहुं, पादं जानु चोपशोष्य वक्त्रार्धं वक्रीकरोति तस्य लक्षणानि–मुखं जिह्मं करोति, नासाभ्रूललाटाक्षिहनुः वक्रीकरोति, आस्ये भोजनं वक्रं व्रजति न समं, मुखेन खादति किन्तु वक्त्रैकदेशेन, वक्रनासिका, कथने स्तब्धनेत्रत्वम्, क्षवथुनिग्रहः, अस्य वाक् दीना, जिह्मा, समुत्क्षिप्ता कला च सती सज्जति, दन्ताश्चलन्ति, श्रवणौ बाध्येते, स्वरो भिद्यते, पादहस्ताक्षिजङ्घोरुशङ्खश्रवणगण्डानां रुजा भवन्ति ।

(चचि.२८.३८–४२)

आर्दितः वेगितया न सर्वकालं भवति । अर्धाङ्गस्तु सर्वकालं व्याप्य भवति । चक्रः ।

वेगित्वेनार्दिते कदाचिद्वेदना भवति, अर्धांगवाते तु सर्वदैवेति भेदः (मधुकोशः) । असाध्यलक्षणम्–क्षीणस्यानिमिषाक्षस्य प्रसक्ताव्यक्तभाषिणः वेपनस्य चार्दितं न सिध्यति, तथा च गाढं त्रिवर्षमपि न सिध्यति (सुनि. १.७३)

ऐंशी वातविकारातील एक. ज्यात तोंड वाकडे होते तो रोग. तोंडाच्या अर्ध्या भागावर नियंत्रण नाहीसे होते तो रोग. याला एकायाम असेही म्हणतात. **सामान्य स्वरूप**–तोंड वाकडे होणे. **संप्राप्ति**–प्रकुपित वायु डोके नाक ओठ हनुवटी कपाळ डोळे यांच्या सांध्यात जाऊन तोंडाचा अर्धा भाग व मान वाकडी करतो. **पूर्वरूपे**–रोमांच, कंप, डोळे गढूळ, कातडीला स्पर्श न कळणे. टोचणी, वायू वर पसरणे, तोंड, मान आणि हनुवटी जखडणे. **रूपे**–बोलताना हसतोसे दिसते. तेही वायूमुळे वाकडे होते, डोक्याला कंप, बोल अडखळणे, डोळे स्तब्ध, दांत कटकटतात आवाज पडणे, ऐकू न येणे, शिंक येत असता थांबणे, वास न कळणे, स्मरणात घोटाळा, झोपेत भीति, तोंडाच्या एका कोपऱ्यातून लाळ गळणे, एक डोळा मिटणे, मानेच्यावर शरीरार्धात किंवा ओठात तीव्र वेदना. चरकात अर्धांगवाताला अर्दित म्हटले आहे ह्याची संप्राप्ति–वायु अति वृद्ध होऊन शरिराच्या अर्ध्या भागाला व्यापतो व त्या बाजूचा हात पाय गुडघा शुष्क करतो, अर्धे तोंड वाकडे करतो. वरील लक्षणे असून शिवाय नाक भुवई कपाळ डोळा हनुवटी वाकडी, तोंडात घास वाकडा जातो, सरळ तोंडाने न खातां वाकड्या एका बाजूने तो खातो, नाक वाकडे, बोलताना डोळा ताठतो, शिंक अडते, बोलणे दीनवाणे, वेडेवाकडे होते. जीभ वाकडी व थरथरणारी दिसते आणि अस्पष्ट व अडखळत उच्चार करते. दात हलतात, कानाला पीडा होते, हातपाय, डोळे, पिंड्या, मांड्या, शंख, कान, गाल ह्या अवयवात वेदना. **अर्दित व अर्धांगात फरक**–अर्दिताचा

वेग येत असल्यामुळे तो नेहमी रहात नाही, अर्धांग सर्वकाळ रहात असतो. अर्दितात केव्हा तरी वेदना असतात पण अर्धांगवातात नेहमी वेदना असतात.

**असाध्य लक्षण**–क्षीण, डोळे मिटत नसलेला, अडखळत व अस्पष्ट बोलणारा व कंप असणारा तसेच तीन वर्षे झालेला साध्य होत नाही.

**–अर्दिताकृतिकरण**–न., **अर्दितस्य व्याधेः आकृतिकरणं तेन अर्धवक्त्रभ्रमणादिरूपकरणम्** (चनि. ७.६)
तोंड वाकडे करणे. तोंड वेडेवाकडे करणे.

**अर्ध**–वि., **विभागः** (र. १५.५८, चइ.१.२१)
हिस्सा वाटा, तुकडा.

**–कटीशूल**–पु., **रोगलक्षण०, वातरोगे यस्मिन्नन्यतरः कटीभागः शूल्यते ।** (र. १५.५८)
ज्या वातरोगात कमरेच्या एका बाजूच्या भागात शूळ होतो तो.

**–कपाटसन्धिक**–पु., **बन्ध०, पञ्चदशकर्णबन्धेष्वेकः बाह्यदीर्घैकपालिः इतराल्पपाल्यासह अभ्यन्तरसन्धानेन अर्धकपाटवद्यत्र सन्धी यते स बन्धः ।** (सुसू. १६.१०)
कर्णबंधाच्या १५ प्रकारापैकी एक; कानाबाहेरची लांब असलेली पाळी दुसऱ्या लहान पाळीशी दाराच्या एका फळी सारखी सांधण्याचा प्रकार.

**–काय**–पु., **शरीरस्य दक्षिणो वामो वा पक्षः** (अहृनि. १५.३९)
शरिराचा उजवा किंवा डावा अर्धा भाग.

**–कैशिकी**–वि., **शस्त्रधारा० अर्धकेशप्रमाणा तन्वी (धारा०)** (सुसू. ८.१०)
अर्ध्या केसा इतकी बारीक ( शस्त्राची धार. )

**–( चन्द्र )**–पु., **आकृति०, यत्रार्धचन्द्रवद् आकृतिर्दाहेन जायते सः ।** (असंसू. ४०)
अर्धचंद्राच्या आकारासारखा डाग दिला जातो तो. दाह.

**–( चन्द्रा )**–स्त्री., **त्रिवृच्छ्यामा** (ध. १. २४३)
काळे तेड. काळे निशोत्तर.

**–चन्द्राकृति**–वि., **छेद०, अर्धचन्द्राकारः** (सुसू. ५.१४) शस्त्राने केलेला अर्धचंद्राकार छेद.

**–चन्द्रानन**–न., **शस्त्र०, अर्धचन्द्रास्यसंज्ञं शस्त्रम् ।** (अहृसू. २६.११) या नांवाचे शस्त्र.

**–चन्द्रिका**–स्त्री. **वनस्पति०, कर्णस्फोटा** (रापरि. ३.४१) कानफोडी, तिळवण.

**–तिक्त**–पु., **किराततिक्तः** (रा. ९.५२)
काडे चिराईत.

**–तृतीय**–वि., **अर्धं तृतीयं यस्य तत्, तृतीयादूनार्धम्, सार्धद्वयम् इति ।** (सुचि. ३१.७) अडीच.

**–धार**–न., **शस्त्र०, एतत्संज्ञकं छेदनोपयोगि तिर्यग्धारं शस्त्रम्** (चशा. ८.४४) **एतस्य शस्त्रस्य अर्धपर्यन्तमेव धारा वर्तते, तस्मादर्धधारम् ।** (सुसू. ८.३) **एतद्वक्रधारम् ( चक्रधारं पाठः ) आयामे अष्टाङ्गुलं फलसन्धौ अङ्गुलविस्तारं, द्व्यङ्गुलदीर्घं, भेदनेऽपि उपयोगि शस्त्रम् ।** (सुसू. ८.३)
या नावाचे तोडण्याच्या कामाचे एक शस्त्र. ज्याला तिरकी अर्धी धार असते. आठ अंगुळे लांब फाळाच्या सांध्याजवळ एक अंगुळ पसरट दोन अंगुळे लांब असलेले. फोडण्याच्या ही उपयोगाचे असते.

**–पलिक**–वि., **मान० अर्धपलम् कर्षद्वयपरिमितम्** (सुचि. २८.३)
दोन तोळे.

**–पात्र**–न., **अर्धाढकम्** (सुउ. ५८.५३) बत्तीस तोळे.

**–भेद**–पु., **शिरोरोग० अर्धावभेदकापरपर्यायः** (सुउ. २५.१६)
अर्धे डोके दुखणे. अर्धशिशी.

**–मास**–न., **काल०, पक्षः** (असंशा. ९.२३)
अर्धा महिना. एक पक्ष.

**–मासूरी**–वि., **शस्त्रधारा० मसूरदलधारार्धतन्वी** (असंसू. ३४.३५)
मसूरीच्या डाळीच्या कडेच्या निम्मे धार असलेले शस्त्र.

**–रात्र**–पु., न., **मध्यरात्रः** (सुचि. २४.११७) **रात्रेर्मध्ययामद्वयं ' सात्त्विका अर्धरात्र स्वपन्ति** (ड. सुशा. [illegible]

**तत् स्वभावः–" भूगोलाधःस्थितसूर्यत्वाद् भावेऽपि कालस्वभावात् आहारवशाच्च लिङ्गानि भवन्तीति भिषजो मन्यन्ते** [illegible] **चयप्रकोपप्रशमविषयानुरोधात् ज्ञेयम्"** (सुसू.६.[illegible]
अर्धी रात्र, मध्यरात्र. रात्रीचे मधले दोन सात्विक प्रकृतीच्या व्यक्ति अर्धी रात्र झोप तिचा स्वभाव – भूगोलाच्या खाली सूर्य अस सूर्याच्या उन्हाच्या अभावाने सुद्धा ज्यो आणि कालाच्या स्वभावाने व आहाराने [illegible] चिन्हे होतात असे वैद्य समजतात. हे दोषांच्य प्रकोप व प्रशमाच्या अनुरोधाने समजावे.

–लाङ्गल–क., पु., भगन्दरे प्रयुक्तानां छेदानामेकतमः छेद०, पार्श्वच्छेदोऽर्धलाङ्गलः अर्धहलसदृशच्छेदः ( असंउ. ३३ ) 'दललाङ्गलः' अस्य पर्यायः ( अहृउ. २८.३० )

भगंदरात शस्त्राने घ्यावयाचा छेद. अर्ध्या नांगरासारख्या आकाराचा छेद. दललांगल हा पर्याय शब्द.

–वेदधर–वि., अर्धज्ञानधरः शास्त्रज्ञः कर्मज्ञो वा ( सुसू. ३.५० )

अर्धवट ज्ञान घेतलेले शास्त्रज्ञ किंवा कर्मकार.

–शक्ति–स्त्री., स्वशक्त्यर्धम्, बलार्धम्. ( अहृसू. २.११ )

अर्धी शक्ति. अर्धे बळ.

–शिरोरुजा–स्त्री., रोग० अर्धावभेदकः ( का. दुष्प्रजातचि. ११.१२ )

अर्धे डोके दुखणे.

–सौहित्य–न., अर्धतृप्तिः ( सुसू. ४६.४९५; असंसू. ११ )

अर्धी तृप्ति. अर्धे समाधान.

अर्धाङ्गवात–पु., रोग० पक्षवधः ( र. २१.१५ )

पक्षाघात; अर्धांगवात.

अर्धाढक–न., मान० द्वात्रिंशत्पलानि, चतुःषष्टिपलानि इत्येके । ( सुउ. ५५.४५ )

बत्तीस पळे. १२८ तोळे. ६४ पळे २५६ तोळे. ( अन्यमत. )

अर्धावभेद–( क., पु. न., ) शिरोरोग० अर्धे तु मूर्ध्नः सोऽर्धावभेदकः । ( अहृउ. २३.७. )

अर्धे डोके दुखणे.

संप्राप्तिः–कुपितो वातः केवलः सकफो वा शिरसोऽर्धे गृहीत्वा मन्याभ्रूकर्णशंखाक्षिललाटार्धे शस्त्रारणिनिभां तीव्रां वेदनां कुर्यात् ।

( चसि. ९.७४.७६; ) लक्षणम्–शिरोर्धभागेऽकस्मात् पक्षाद्दशाहाद्वा भेद-तोद-भ्रम-शूला भवन्ति, अतिवृद्धस्तु लोचनं कर्णं वा विनाशयेत् ।

( सुउ. २५.१५; असंउ. २७; ) त्रिदोषजोऽयं व्याधिः । ( सुउ. २५.१५; ) व्याधिरयं चिकित्सितं विनाऽपि उपशाम्यति ( असंउ. २७ )

संप्राप्ति–कुपित, सकफ किंवा केवळ वात डोक्याचा अर्धा भाग पकडून मान, भुवई, कान, शंख, डोळा, अर्धे कपाळ येथे शस्त्राने कापल्यासारखे दुःख देतो.

लक्षण–डोक्याच्या अर्ध्या भागात एकदम, पंध्रवड्याने, दहा दिवसांनी फोडल्या प्रमाणे, टोचल्याप्रमाणे शूल व भ्रम होतो. अतिशय वाढला तर कान किंवा डोळा जातो. त्रिदोषज विकार. उपचारावाचून ही हा कमी होतो.

अर्बुद–पु., पर्वत०, गुर्जरप्रान्तीयः, 'अबूचा पहाड' इति लोके । अस्मिन् पर्वते 'चन्द्रमाः' इति सोमविशेषः उपलभ्यते । ( सुचि. २९.२७ ) अस्य पार्श्वे मृद्दारशृङ्गकमुपलभ्यते । ( र. ३.१६२ )

या पर्वतावर एक प्रकारची सोमवल्ली सापडते. त्याचे बाजूला उतरणीवर मुर्दाडशिंग सापडते.

न., द्वितीयमासे नपुंसकगर्भस्य रूपं संस्थानं वा ( सुशा. ३.१८ ) । तत् संस्थानं डल्हणमतेन वर्तुलफलार्धम् । गयीमतेन शाल्मलीमुकुलाकारम् ( सुशा. ३.१८ ) इन्दुमतेन परिवृत्तम् ( असंशा. २ )

चक्रपाणिमतेन वर्तुलोन्नतम् ( चशा. ४.१० )

दुसऱ्या महिन्यातील नपुंसक गर्भाचा आकार. त्याचा आकार अर्ध्या गोल फळासारखा, सावरीच्या किंचित् उमललेल्या कळीसारखा, गोल वाटोळा, वर आलेला असा निरनिराळ्या प्रकारचा सांगतात.

पु., न., रोग०, उत्सेधप्रधानः, ( चसू. १८.३३ ) ग्रन्थिसदृशोऽयम् ( सुनि. ११.१३ ) संप्राप्तिः–वृद्धा दोषा अनियतदेशे मांसमभिप्रदूष्य ग्रन्थिसदृशमुत्सेधं कुर्वन्ति । अस्य अधिष्ठानं रोहिणी नाम त्वक् ( सुशा. ४.४ )

लक्षणम्–तत् मांसोपचितं वृत्तं स्थिरं मन्दरुजं महद् अनल्पमूलं चिरवृद्धि अपाकं च भवति । अस्यापाकत्वे कारणम्–कफाधिकत्वं मेदोबहुत्वं दोषस्थिरत्वं ग्रथनं च ( सुनि. ११.१३, १४, २१ ) अर्बुदोऽयं ग्रथितो महान् भवति । ( असंउ. ३४ )

सङ्ख्यातः षड्विधम्, वात–पित्त–कफ–रक्त–मांस–मेदोज–भेदात् ( सुनि. ११.१४ )

लक्षणानि–वातपित्तकफमेदोजानां लक्षणानि वातादिग्रन्थिलक्षणैः समानानि भवन्ति ( सुनि. ११.१५ ) रक्तजस्य संप्राप्तिलक्षणे–प्रदुष्टो दोषो रुधिरं संपीड्य सिराश्च संकुच्य शोणितं पाचयेत् । अनन्तरं मांसाङ्कुरैराचितमाशु वृद्धं मांसपिण्डं स्रावमुन्नह्यति । अजस्रं दुष्टरुधिरप्रवृत्तिं करोति । रक्तार्बुदपीडितः रक्तक्षयोपद्रवपीडितत्वात् पाण्डुर्भवति ( सुनि. ११.१६ )

**रक्तार्बुदमेतदसाध्यम्** ( सुनि.११.१७ )
**रक्तार्बुदं तालुमध्यगतम्–तस्य लक्षणम्–तालुमध्ये पद्माकारः शोफो भवति । तेन मांसपिण्डं साङ्कुरम् उद्गतं भवति ( भोजः ) प्रदुष्टं रक्तं स्रवति, तेन चातुरः पाण्डुर्भवति** ( सुनि. १६.४३ )
**अत्र भोजवचनम्–" उपर्यैव भवेन्नद्धो यथा पद्मस्य कर्णिका । पार्श्वतश्चाङ्कुरैर्दीर्घैः नाशा ( नासा ? ) चाप्यवसीदति ॥ श्लेष्मरक्तसमुत्थानं तत्तात्ल्वर्बुद-संज्ञितम् । " गयी**
**तात्ल्वर्बुदमसाध्यम्. मांसजार्बुदस्य संप्राप्तिः लक्षणं च–मुष्टिप्रहारादिभिरर्दितेऽङ्गे प्रदुष्टं मांसमवेदनं स्निग्धमनन्यवर्णं त्वक्सदृशवर्णम् अपाकम् अश्मोपमम् अप्रचाल्यं शोफं करोति, विशेषतश्च एतत् मांसपरायणस्य भवति । एतदसाध्यम्**
( सुनि. ११.१८ )

**अर्बुदसाध्यासाध्यता–वात–पित्त–कफ–मेदोजानि । चत्वारि अर्बुदानि साध्यानि । रक्तमांसजे द्वे असाध्ये ।** (असंउ. ३४,) **साध्येष्वपि यत् संप्रस्रुतं मर्मणि स्रोतस्सु वा जातं, यच्च अचाल्यं, पूर्वजातेऽर्बुदे जातं तदसाध्यम् ।** (सुनि. ११.१९,) **अत्र चिकित्सासूत्रम्-'सर्वाण्यर्बुदानि छेद्यविषयाणि ।** (सुसू. २५.३,) **अर्बुदमशेषं समुद्धरेत् । सशेष-दोषमाशु पुनर्भवति ।** (सुचि. १८.४२) **अर्बुदेऽग्निकर्म-चिकित्साऽपि क्रियते** (सुसू. १२.१०); **अर्बुदस्थानानि-अर्बुदानि क्वचिदेवानियतप्रदेशे, कपाल** (असंउ. २७) **तालु** (असंउ. २७) **नासा** (सुउ. २२.१८) **नेत्रवर्त्मादि** (सुउ. ३.२४) **नियतप्रदेशेष्वपि संभवन्ति ।**

एक रोग. उंचावलेली सूज मुख्य असते. गाठी सारखा प्रकार. **संप्राप्ति**–वाढलेले दोष शरिराच्या कोणत्याही भागात मांसाची दुष्टि करून गाठी सारखी सूज निर्माण करतात, रोहिणी नावाची त्वचा याचे अधिष्ठान. **लक्षण**–ते मांसाने पुष्ट वाटोळे स्थिर मंद वेदना-युक्त मोठे विस्तृत मूळ असलेले दीर्घकाळ वाढणारे न पिकणारे असते. **न पिकण्याचे कारण** स्थिर स्वभावी होय. कफाधिक दोष व मेदोधातूचे आधिक्य असून दोष एके ठिकाणी जमा होतात म्हणून गाठ मोठी होते. **संख्या**–सहा. वात, पित्त, कफ, रक्त, मांस, मेदोज असे. लक्षणे–वातग्रंथी इत्यादी ग्रंथी सारखी होतात. **रक्तार्बुद**–दुष्ट झालेला दोष रक्त दुष्ट करून शिरांचा संकोच करून रक्ताचे पचन करतो. नंतर मांसाच्या अंकुरांनी साचलेला लवकर वाढणारा मांसाचा पिंड उत्पन्न करतात, त्यातून रक्तस्राव होतो. दुष्ट रक्ताचा स्राव होतो म्हणून रक्तक्षय व त्यामुळे पांडु होतो, म्हणून रक्तार्बुद असाध्य असतो. टाळूला रक्तार्बुद होतो. ती सूज कमलाकार असते. मांसांकुर वर उचलून येतात व त्यातून रक्त स्रवते म्हणून तो पांडूने पीडित होतो. हा असाध्य असतो, कफ रक्त दुष्टि यात असते. **मांसार्बुद**–मांस नेहमी खाणाऱ्याच्या अंगावर बुक्की इ० प्रहार होऊन शरिराच्या भागावर दुष्ट मांस त्वचेच्या रंगा-सारखी, स्निग्ध, वेदना नसलेली, दगडासारखी कठीण, न हालणारी न पिकणारी सूज करतो. हा अर्बुद असाध्य. **साध्यासाध्यत्व**–वात, कफ, पित्त, मेदोज हे चार साध्य. रक्तज व मांसज असाध्य. साध्यातही जे फार पसरते, जे मर्मात किंवा स्रोतसात होते, जे हालत नाही, जे प्रथम झालेल्या अर्बुदावर होते ते असाध्य. **अर्बुदोपचार**–सर्व अर्बुदे छेदण्याचा विषय आहे. सर्व अर्बुदे मुळापासून काढावीत, मुळात थोडे शिल्लक राहिले तरी ते पुन्हां लवकर वाढते, अग्नीने डागही द्यावा. अर्बुदाची **स्थाने**–कवटी, टाळू, नाक, डोळ्याच्या पापण्या व इतर ठराविक भागांवरही होतो.

**अर्बुर**–न., **आहुल्यम्** (रा. परि. ४.३३)
तरवड, तरोटा.

**अर्मण**–पु. न., **मान०, द्रोणः, चतुर्गुणः कंसः** (असंक. ८.)
**चतुराढकं, चतुर्विंशत्यधिकसहस्रतोलम्** (र. ११.८)
दहाशे चोवीस तोळे.

**अर्मन्**–न., **नेत्ररोग०, नेत्रस्य शुक्लमण्डलगतो मांस-संचयरूपो व्याधिः, तस्य प्रकाराः–प्रस्तार्यर्म, शुक्लार्म, क्षतजार्म, ( लोहितार्म ) अधिमांसार्म, स्नाय्वर्म इति पञ्च** (सुउ. ४.३)
डोळ्याच्या पांढऱ्या भागावर मांसाची वाढ होते त्याला हे नांव आहे. त्याचे प्रकार, प्रस्तारी, शु[illegible] क्षतज, अधिमांस व स्नायु मर्म असे ५ आहेत

**अर्वाचीन**–वि., **नातिदूरप्रविष्टम्** (अहसू. २८.
फार आत न शिरलेले, अलीकडचे.

**अर्शस्**–न., **रोग०, निरुक्तिः-"अरिवत् विशर शांसि"** । (असंनि. ७.)

गुदकीलस्वरूपमेतत् अर्शसां क्षेत्रमधिष्ठानं च सर्वेषां चार्शसां गुदस्यार्धपञ्चाङ्गुलावकाशे त्रिभागान्तरास्तिस्रो गुदवलयः क्षेत्रमिति, केचित्तु भूयांसमेव देशमुपदिशन्ति अर्शसां तद्यथा– शिश्नमपत्यपथं गलतालुमुखनासिकाकर्णाक्षिवर्त्मानि त्वक् चेति । तदस्त्यधिमांसदेशतया, गुदवलिजानां तु अर्शांसीति संज्ञा तन्त्रेऽस्मिन् ( चचि. १४.६ ) सर्वेषां चार्शसामधिष्ठानं मेदो मांसं त्वक् च। ( चचि. १४.६ ) ( असंनि. ७ ) अयं बहिर्मार्गजो व्याधिस्तथा अन्तर्मार्गजोऽपि । ( चसू. ११.४९ ) तस्याधिष्ठानं मांसधरा नाम त्वक् । ( सुशा. ४.४ ) संप्राप्तिः–यथोक्तैश्चयप्रकोपणैः प्रकुपिता दोषाः शोणितसहिता वा यथोक्तं प्रसृताः प्रधानधमनीरनुप्रपद्य अधो गत्वा गुदमागम्य गुदवलीः प्रदूष्य तत्र मांसप्ररोहाञ्जनयन्ति ( सुनि. २.४ )

" दोषास्त्वङ्मांसमेदांसि सन्दूष्य विविधाकृतीन् ।
मांसाङ्कुरानपानादौ कुर्वन्त्यर्शांसि तान् जगुः ॥ "
( अहृनि. ७.२ )

संख्या–द्विविधान्यर्शांसि कानिचित् सहजानि, कानिचिज्जातस्योत्तरकालजानि; तत्र बीजं गुदवलिबीजोपतप्तमायतनमर्शसां सहजानाम् । तत्र द्विविधो बीजोपतप्तौ हेतुः–मातापित्रोरपचारः पूर्वकृतं च कर्म । तत्र सहजानि सह जातानि शरीरेण ।
( चचि. १४.५ )

अथेतराणि षड्विधानि पृथग्दोषैः संसृष्टैः सन्निपतितैः शोणितेन च । तत्र वातश्लेष्मोत्तराणि शुष्काणि, रक्तपित्तोत्तराण्यार्द्राणि । ( असंनि. ७ ) 'षडर्शांसि भवन्ति वातपित्तकफशोणितसन्निपातैः सहजानि चेति ।' ( सुनि. २.३ ) पूर्वरूपाणि–

'विष्टम्भोऽन्नस्य दौर्बल्यं कुक्षेराटोप एव च ।
कार्श्यमुद्गारबाहुल्यं सक्थिसादोऽल्पविट्कता ॥
ग्रहणीदोषपाण्ड्वर्तेराशङ्का चोदरस्य च ।
पूर्वरूपाणि निर्दिष्टान्यर्शसामभिवृद्धये ॥'
( चचि. १४.२१ )

सुश्रुते तु–अन्नेऽश्रद्धा, कृच्छ्रात्पक्तिः, परिदाहः, पिपासा, अक्ष्णोः श्वयथुः, अन्त्रकूजनं, गुदपरिकर्तनं, कासः, श्वासः बलहानिः
भ्रमस्तन्द्रा निद्रेन्द्रियदौर्बल्यं च । ( सुनि. २.८ ) अश्मगर्भाभनाभित्वम्, बहुमूत्रत्वम्, आलस्यं गुल्मरोगाशङ्का च । ( असंनि. ७ )

सामान्यरूपम्–पूर्वरूपाणि प्रव्यक्ततराणि भवन्ति ( सुनि. २.९ ) सर्व एव अर्शसो भवति अतिकृशो विवर्णः क्षामो दीनः प्रचुरविबद्धवातमूत्रपुरीषः; अश्मरीशर्करावान् अनियतविबद्धमुक्तामपक्वविभिन्नशुष्कवर्चाः अन्तरान्तराश्वेतपाण्डुहरितरक्तपीतारुणतनुसान्द्रपिच्छिलोपवेशी नाभिवंक्षणोद्देशप्रचुरपरिकर्तिकान्वितः सगुदशूलप्रवाहिकापरिहर्षप्रमोहः, अल्पशुक्रप्रजः, अल्पभुक्, सिरासन्ततगात्रः, क्रोधनो दुरुपचारः, कासश्वासतृष्णापीनसारोचकपाणिपादवदनाक्षिकूटश्वयथुक्षवथुवेपथुवमथुपरीतः, तैमिरिकः, शिरःशूली, क्षामभिन्नस्वरः, कर्णरोगी, सज्वरः, साङ्गमर्दः, सर्वपर्वास्थिशूलः, अन्तरान्तरा हृदयकुक्षिपार्श्वपृष्ठबस्तित्रिकग्रहोपतप्तः, प्रध्यानपरः परमालसश्च । ( असंनि. ७ ), वातजार्शोलक्षणानि–परिशुष्कारुणविवर्णानि विषममध्यानि, कदम्बपुष्पतुण्डिकेरीनाडीमुकुलसूचीमुखाकृतीनि च भवन्ति अर्शांसि । तैरुपद्रुतः सशूलं संहतमुपवेश्यते, कटीपृष्ठपार्श्वमेढ्रगुदनाभिप्रदेशेषु चास्य वेदना भवन्ति, गुल्माष्ठीलाप्लीहोदराणि च अस्य तन्निमित्तान्येव भवन्ति, कृष्णत्वङ्नखनयनदशनवदनमूत्रपुरीषश्च पुरुषो भवति । ( सुनि. २.१० ). तीक्ष्णस्फुटितमुखानि, सिद्धार्थबिम्बीखर्जूरफलप्रमाणानि वक्राणि शूलोदावर्तकराणि अर्शांसि भवन्ति । ( असंनि. ७ ) पित्तजार्शोलक्षणानि-पित्तात् नीलाग्राणि तनूनि विसर्पीणि पीतावभासानि यकृत्प्रकाशानि शुकजिह्वासंस्थानानि यवमध्यानि जलौकोवक्त्रसदृशानि प्रक्लिन्नानि च भवन्ति, अर्शांसि । तैरुपद्रुतः सदाहं सरुधिरमतिसार्यते, ज्वरदाहपिपासामूर्च्छाश्च अस्योपद्रवा भवन्ति, पीतत्वङ्नखनयनदशनवदनमूत्रपुरीषश्च पुरुषो भवति ( सुनि. २.११ ) किञ्च तानि रक्तपीत–कृष्णानि, मृदुशिथिलानि, स्पर्शासहानि, विस्रगन्धीनि दाहपाकवन्ति अरुचिकराणि च ( असंनि. ७ )

श्लेष्मजार्शोलक्षणानि–श्लेष्मजानि श्वेतानि महामूलानि स्थिराणि वृत्तानि स्निग्धानि पाण्डूनि करीरपनसास्थिगोस्तनाकाराणि, न भिद्यन्ते न स्रवन्ति, कण्डूबहुलानि च भवन्त्यर्शांसि । तैरुपद्रुतः सश्लेष्माणमनल्पं मांसधावनप्रकाशमतिसार्यते, शोफशीतज्वरारोचकाविपाकशिरोगौरवाणि चास्य तन्निमित्तान्येव भवन्ति शुक्लत्वङ्नखनयनदशनवदनमूत्रपुरीषश्च पुरुषो भवति ( सुनि. २.१२ )

गुरुस्तब्धश्लक्ष्णपिच्छिलानि सुप्रसुप्तानि स्पर्शक्षमाणि वंक्षणानाह–नाभिपरिकर्तिका–हृल्लास–प्रसेक-कास-श्वास–कृच्छ्रमूत्र–प्रमेहेन्द्रियोपलेपाग्निमार्दवक्लैब्या-मविकारप्रबलानि भवन्ति ( असंनि. ७ )

रक्तजार्शो-लक्षणानि–रक्तजानि न्यग्रोधप्ररोहविद्रुम-काकणन्तिकाफलसदृशानि पित्तलक्षणानि च, यदा अवगाढपुरीषपीडितानि भवन्ति तदा अत्यर्थं दुष्टमनल्पमसृक् सहसा विसृजन्ति, तस्य चाति-प्रवृत्तौ शोणितातियोगोपद्रवा भवन्ति ।

( सुनि. २.१३ )

सन्निपातजानि अर्शांसि सर्वदोषलक्षणयुक्तानि

( सुनि. २.१४ )

सहजार्शोलक्षणानि–तेषां दोषत एव प्रसाधनं कर्तव्यम् । विशेषतश्चैतानि दुर्दर्शनानि परुषाणि पांसूनि दारुणानि अन्तर्मुखानि । तैरुपद्रुतः कृशः अल्पभुक् सिरासन्ततगात्रः, अल्पप्रजः क्षीणरेताः क्षामस्वरः, क्रोधनः, अल्पाग्निप्राणः, परमालसश्च, तथा घ्राणनासाशिरोऽक्षिश्रवणरोगी सततम् अन्त्रकू-जाटोपहृदयोपलेपारोचकप्रभृतिभिः पीड्यते ।

( सुनि. २.१०–१५ )

अर्शसां परमः उपद्रवः उदावर्तः दुर्नाम्नामित्यु-दावर्तः परमोऽयमुपद्रवः ।'' ( असंनि. ७ )

अर्शोऽरिष्टानि–

'' तृष्णारोचकशूलार्तमतिप्रसृतशोणितम् ।
शोफातीसारसंयुक्तमर्शोव्याधिर्विनाशयेत् ।''

( सुसू. ३३.१० )

साध्यासाध्यत्वम्–बाह्यवलिजातानि, अचिरोत्पति-तानि अर्शांसि सुखसाध्यानि, द्वितीयवलौ आश्रि-तानि द्वन्द्वजानि परिसंवत्सराणि कृच्छ्रसाध्यानि । त्रिदोषाणि सहजानि च अभ्यन्तरवलौ स्थितानि असाध्यानि । (चचि. १४.२६–३२)

अर्शसां चिकित्सासूत्रम्–

'' यद्वायोरानुलोम्याय यदग्निबलवृद्धये ।
अन्नपानौषधद्रव्यं तत्सेव्यं नित्यमर्शसैः ॥''

( चचि. १४.२४७ )

चतुर्विधोऽर्शसां साधनोपायः । तद्यथा–भेषजं, क्षारोऽग्निः शस्त्रमिति । अचिरकालजातान्यल्पदोष-लिङ्गोपद्रवाणि भेषजसाध्यानि । भेषजेषु कुटज-भल्लातकौ श्रेष्ठौ । मृदुप्रसृतावगाढान्युच्छ्रितानि क्षारेण । कर्कशस्थिरपृथुकठिनान्यग्निना तनुमू-लान्युच्छ्रितानि क्लेदवन्ति च शस्त्रेण । शस्त्रकर्म तु



अभुक्तवतः कुर्वीत ( सुचि. ६.१३–१९ )

( सुसू. ५.१६

अपथ्यम्–

'' वेगावरोधस्त्रीपृष्ठयानानि उत्कटुकासनम् ।
यथास्वं दोषलं चान्नम् अर्शस्सु परिवर्जयेत् ॥''

( सुचि. ६.२२ )

अन्यानि अर्शांसि–

कर्णजम् अर्शः, कर्णरोग०, कर्णस्थानाश्रितम् संप्राप्तिः–प्रकुपिता दोषा ऊर्ध्वमागताः कर्णेऽर्शांसि जनयन्ति । लक्षणानि-कर्णबाधिर्यं, शूलं, पूति-कर्णता च ( सुनि. २.१७ )

घ्राणजम् अर्शः, नासागतरोग०, संप्राप्तिः–प्रकुपिता दोषा ऊर्ध्वमागता घ्राणयोः मांसशोणिते प्रदूष्य अर्शांसि जनयन्ति ।

लक्षणानि-अतिमात्रप्रतिश्यायः, क्षवथुः, कृच्छ्रो-च्छ्वासता, पूतिनस्यं, सानुनासिकवाक्यत्वं, शिरो-दुःखं च भवति ( सुनि. २.१७ )

त्वक्स्थम् अर्शः–त्वग्गतरोग०, चर्मकीलपर्यायः व्यानो वायुः कफं गृहीत्वा त्वचो बहिः कीलो-पमं स्थिरखरमर्शः करोति ( मा. सुनि. २.१८ )

नाभिजम् अर्शः-नाभिरोग०, लक्षणम्-''गंडूपदास्य-रूपाणि पिच्छिलानि मृदूनि च'' । (सुनि. २.१७)

नेत्रजम् अर्शः–नेत्ररोग०, प्रकुपिता दोषा ऊर्ध्वमा-गता मांसशोणिते प्रदूष्य नेत्रयोरर्शांसि जनयन्ति । लक्षणानि-वर्त्मावरोधः नेत्रवेदना, नेत्रस्रावः, दर्श-ननाशश्चापि (सुनि. २.१७)

मेढ्रजं योनिजं च अर्शः–प्रकुपितास्तु दोषाः मेढ्रमभिप्रपन्ना मांसशोणिते प्रदूष्य कण्डूं जन-यन्ति । ततः कण्डूयनात् क्षतं समुपजायते । तस्मिंश्च क्षते दुष्टमांसजाः प्ररोहाः पिच्छिलरुधिर-स्राविणो जायन्ते, कूर्चकिनोऽभ्यन्तरम् उपरिष्टाद्वा, ते तु शेफो विनाशयन्ति, उपघ्नन्ति च पुंस्त्वम् । योनिमभिप्रपन्नाः सुकुमारान् दुर्गन्धान् पिच्छि-लरुधिरस्राविणः छत्राकारान् करीरान् जनयन्ति ते तु योनिमुपघ्नन्ति आर्तवं च । ( सुनि. २.१७ )

वक्त्रजम् अर्शः–

लक्षणानि–कण्ठौष्ठतालूनामन्यतमस्मिन् स्थाने उत्प-न्नेष्वर्शस्सु गद्गदवाक्यता रसाज्ञानं, मुखरोगाश्च भवन्ति ( सुनि. २.१७ )

मूळव्याध. अरिवत् म्हणजे शत्रूसारखे ठार करतो तो विकार. **स्थाने**–गुदात खिळ्यासारखा अंकुर स्वरूप

असतो. ५॥ अंगुलमर्यादेच्या तिन्ही गुदवलींवर होतो. यापेक्षाही अधिक मार्ग असतो असे एक मत. शिश्न, योनि, गळा, टाळू, तोंड, नाक, कान, डोळ्याच्या पापण्या व कातडी. वास्तविक हा विकार अधिमांसाधाराने होत असतो, पण गुदात असलेल्या वलीवरील रोगालाच मुख्यतः अर्श ही संज्ञा लावतात. सर्वांचे अधिष्ठान मेद, मांस, त्वचा होय. हा बहिर्मार्गज तसाच अंतर्मार्गज रोग. अधिष्ठान मांसधरा त्वचा. **संप्राप्ति**–दोष रक्तासह मुख्य शिरेत येऊन खाली जाऊन गुदात येऊन गुदवली दूषित करून तेथे मांसाचे अंकुर उत्पन्न करतात, दोष त्वचा मांस व मेद दुष्ट करून गुद इत्यादी ठिकाणी मूळव्याध करतात. **दोन प्रकार**–१ गुदवलीचे बीजच दोषांनी दुष्ट झाले तर जन्मतः मूळव्याध होते. ती **सहज,** शरीराबरोबरच जी जन्मते ती. याला कारण आई व बाप यांचे अपचार व पूर्वकर्म. २ **जन्मानंतरची.** तिचे प्रकार ६. एकाकी दोषांची तीन, मिश्र दोषांची, संनिपाताची व रक्ताची. वातकफाधिक असते ती सुकी मूळव्याध व रक्तपित्ताधिक असते ती ओली मूळव्याध.

**पूर्वरूपे**–अन्नाची इच्छा नसणे, अशक्तता, कुशीत गुडगुड, कृशता, पुष्कळ ढेकरा, मांड्या गळणे, मळ थोडा, ग्रहणी उदर व पांडु हे रोग झाल्याची शंका, कष्टाने अन्नपचन, प्रादेशिक दाह, तहान, डोळ्यावर सूज, गुदात कातरल्यासारखी वेदना, खोकला, श्वास, बलनाश, भ्रम, झापड, झोप, इंद्रियांची दुर्बलता, बेंबीजवळ दगड असल्याचा भास, लघ्वीला अधिक होणे, आळस, गुल्मरोगाची शंका. **सामान्य रूप**–वरील पूर्वरूपे अधिक व्यक्त होतात. वाढतात. अर्शाचे सर्व रोगी अतिकृश, विकृत वर्णाचे, थकलेले, मनाने निराश असतात. वात मळमूत्रांचा अतिशय अवरोध, मूतखडा, मूत्ररेव, मधून मधून पांढरा, पांढरट हिरवा, लाल, पिवळा, लालसर, दाट, पातळ, बुळबुळीत मळ पडणे. बेंबी ओटीपोट यात सारखी कातरल्यासारखी वेदना, गुदात शूल, कुंथ, रोमांच, विचार न सुचणे, शुक्र व प्रजा अल्प, थोडा आहार, अवयवांवर शिरा पसरलेल्या, रागीट, उपचार करण्यास कठीण, खोकला, श्वास, तहान, पडसे, रुचिनाश, हातपाय तोंड डोळे यावर सूज, शिंक, कंप, वांती, अंधेरी, डोकेदुखी, थकलेला फुटलेला स्वर, कानाचा रोग, ज्वरयुक्त अंगदुखी, पेरी व हाडे फुटणे मधून मधून हृदय, कुशी, फासळ्या, पाठ, बस्ति माकडहाड तापलेले असणे, नेहमी सचिंत व आळशी असणे ही चिन्हे होतात. **वातज**–सुकट वाकडे तांबुस मोड, त्वचा इत्यादी काळसर, गुल्मादि रोग, शूल पोटफुगी इ० वातज विकारयुक्त. **पित्तज**–तांबडे, लाल, पिवळे, काळे, निळ्या टोकाचे, पोपटाच्या जिभेसारखे, मऊ, ढिले, स्पर्श सहन न होणारे, ओलसर कोंब. आग व रक्त युक्त अतिसार ताप दाह तहान मूर्च्छा व त्वचा इ० पिवळी असतात. **कफज**–पांढरे, मोठ्या स्थिर मुळाचे, वाटोळे, स्निग्ध स्थिर, गुळगुळीत, बुळबुळीत, गाईच्या स्तनासारखे. स्पर्श सहन करणारे मोड. सूज, थंडी वाजून ज्वर, अरुचि, अपचन, आमविकार, प्रमेह इत्यादी विकारयुक्त. तोंडाला पाणी व घशाशी उचंबळणे, खोकला श्वासयुक्त. त्वचा इत्यादी पांढरी असलेला असा तो रोगी असतो. त्या त्या दोषाच्या मूळव्याधीत त्या त्या दोषांची आणखीही चिन्हे होतात. **रक्तज**–वडाचे कोंब, प्रवाळ, गुंजांसारखे लाल मोड. पित्ताची सर्वलक्षणे. जेव्हा कठीण मळ असतो तेव्हा एकदम दुष्ट व पुष्कळ रक्त जाते. ते अति गेल्याने अनिष्ट परिणाम होतात. **संनिपातज**–सर्वदोष लक्षणे होतात. **सहज**–खरखरीत, कठीण, आत तोंडे असलेले मोड. त्यांनी रोगी कृश, भूक कमी झालेला, अंगावर शिरा पसरलेला, अल्पसंततीचा, शुक्रक्षीण, स्वरक्षीण, रागीट, त्राण नसलेला, आळशी असतो. आतड्यात आवाज, पोटफुगी, हृदय लपेटल्याप्रमाणे, अरुचि ही चिन्हे असतात. यांत दोषांना अनुसरून उपचार करावे. पोट वरच्या भागाकडे फुगणे हा फार मोठा उपद्रव मूळव्याधीत होतो. **साध्यासाध्यत्व**–बाहेरच्या वलीवर व नुकतीच झालेली व एक दोषाची सुखसाध्य; दुसऱ्या वलीवर झालेली व दोन दोषांची एक वर्षाचे आंतील कष्टसाध्य. त्रिदोषज सहज व आतल्या वलीवरची असाध्य. **उपचाराचे सूत्र**–वाताची खाली सरण्याची प्रवृत्ति करील व अग्नीचे सामर्थ्य वाढवील ते अन्न आणि औषध मूळव्याधीत उपयुक्त.

**उपचार**–चार प्रकारचे. औषध, क्षार, अग्नि, व शस्त्र. **औषधसाध्य**–थोडा दोष, थोडी चिन्हे व उपद्रव आणि नवीन असलेले मोड. या स्थितीत कुडा व बिब्बा हे अधिक उपयुक्त. **क्षारसाध्य**–मऊ, पसरलेले, खोल व वर उचलून आलेले मोड. **अग्निसाध्य**–खरखरीत स्थिर कठिण जाड मोड.

**शस्त्रसाध्य**–बारीक मुळे असलेली व ओलसर मूळव्याध, यांचे अनर्शे पोटी शस्त्रकर्म करावे. **अपथ्य**–मळमूत्रांच्या वेगांचा अवरोध, संभोग, घोडा बैल इत्यादी वाहनांच्या पाठीवर बसणे व उकीडवे बसणे, त्या त्या दोषाचे अन्न ही वर्ज्य आहेत. दुसऱ्या मूळव्याधी पैकीं **कानात होणारी**–शूल, पू व बहिरेपणा या लक्षणांनी युक्त. **नाकात होणारी**–अतिशय पडसे, सूज, कष्टाने श्वास, नाकाला घाण, डोकेदुखी व नाकात बोलणे ह्या चिन्हांनी युक्त असून यात मांस रक्त ही दूषित असतात. **त्वचेवरची मूळव्याध**–हिला चामखीळ म्हणतात. येथे वायु कफाच्या सहाय्याने स्थिर खरखरीत खिळ्यासारखे मोड उत्पन्न करतो. **बेंबीतली मूळव्याध**–ही गांडुळाच्या तोंडासारखी बुळबुळीत व मऊ असते. **डोळ्यातील मूळव्याध**–या विकारात मांस रक्त दूषित होतात. पापण्या उघड झाप करतांना त्रास, डोळ्यात वेदना, स्राव व दृष्टीनाश ही चिन्हे असतात. **योनि, लिंग यांची मूळव्याध**–येथे ही मांस रक्त यांची दुष्टि असते. खाज, खाजविल्याने व्रण, व्रणात मांसाचे अंकुर बुळबुळीत व रक्तस्रावी होतात. **लिंगाच्या** आत किंवा वर अंकुरांचे गुच्छ होऊन लिंगाचा नाश व नपुंसकत्व करतात. **योनीत** नाजूक, दुर्गंधी, बुळबुळीत, रक्तस्राव करणारे, छत्रीच्या आकाराचे कोंब होतात; ते मासिक स्राव व योनीचा नाश करतात. **तोंडातली मूळव्याध**–घसा ओठ टाळू यांपैकी कोठेही होते. हिच्यामुळे गेंगाणे बोलणे, रस न समजणे व तोंडाचे रोग होतात.

**( अर्शः ) कुठार**–क., पु., **सिद्धयोग० अर्शोघ्नश्चायम्** (र. १५.९ र. १५.६९) मूळव्याधनाशक एक योग.

**अर्शोग्रन्थि**–पु. **रोग० अर्शोऽनुग्रथितवर्चस्त्वम्**
( चचि. १५.१०२ )

मळाच्या गाठी मूळव्याधीच्या विकारात असणे.

**–घ्न**–पु., **वनस्पति०, कन्द०, सूरणः**
( ध. परि. ४.६ ) सुरण.

**योग० शूलार्शोहरः** ( र. १५.३० )
शूल व मूळव्याधनाशक.

वि., **कषाय० अर्शोहरो महाकषायः; पञ्चाशन्महाकषायेष्वेकः** ( चसू. ४.८ ) मूळव्याधनाशक काढा. पन्नास मोठ्या काढ्यांपैकी एक.

**–घ्नवटक**–पु., **सिद्धयोग० अर्शोनाशनः अग्निदीप्तिकरश्च** ( र. १५.२५ ) मूळव्याधनाशक अग्निवर्धक असे सिद्धवटक. ( औषधी वड्या )

**–भगन्दर**–पु., **रोग० भगन्दरभेदः** ( असंउ. ३३ )
**तत्स्वरूपम्–कफपित्ते पूर्वोत्थमर्शः आश्रित्य कुप्यतः अर्शोमूले कण्डू–दाहादिमान् शोफो भवेत् सः पक्वभिन्नः सन् अर्शसः मूलं क्लेदयन् गतिभिरजस्रं स्रवति** ( असंउ. ३३ )
हा भगंदराचा एक प्रकार आहे. प्रारंभी अर्श झाल्यावर त्याच्या मुळाशी भगंदर होणे. **स्वरूप**–पूर्वीच झालेल्या मूळव्याधीच्या आश्रयाने कफपित्त हे दोष कुपित होऊन तेथेच खाज, आगयुक्त सूज होते, ती पिकते व ती फुटून मूळव्याधीचे मुळात भगंदर होऊन तो सारखा गळत असतो.

**–यन्त्र**–न., **नाडीयन्त्रम्** ( सुसू. ७.१३ )
**यन्त्राकृतिः–तत्र यन्त्रं लौहं, दान्तं, शार्ङ्गं वार्क्षं वा गोस्तनाकारं चतुरङ्गुलायतं पञ्चाङ्गुलपरिणाहं पुंसां षडङ्गुलपरिणाहं नारीणां तलायतम्**
( सुचि. ६.११ )
**तत् त्रिविधम्** ( असंसू. ३४ )
**द्विपार्श्वच्छिद्रं एकपार्श्वच्छिद्रं छिद्ररहितं च** ( इन्दु ) **छिद्रं त्र्यङ्गुलायतमङ्गुष्ठोदरविस्तारम् । यदङ्गुलमवशिष्टं तस्याधोऽर्धाङ्गुलमुपरि तथार्धाङ्गुलोच्छ्रितोद्वृत्तकर्णिकम् । द्विच्छिद्रं दर्शनार्थम् एकच्छिद्रं शस्त्रक्षाराग्निकर्मणि, एकच्छिद्रेणैतेषामतिक्रमो न भवति तृतीयं छिद्ररहितं शम्याख्यं अर्शःपीडनार्थम् ॥**
( असंसू. ३४ )

पोकळ ( नळीसारखे ) यंत्र. ज्याचे योगाने मूळव्याधीची तपासणी करता येते. यंत्राची आकृति–ते लोखंड, दात, शिंग, लाकूड यांपैकी कशाचेही करावे. गाईच्या स्तनासारखे चार अंगुळे लांब पाच अंगुळे घेराचे पुरुषासाठी व सहा अंगुळे घेराचे व त्यांच्या त्यांच्या तळहाताएवढे स्त्रियांसाठी असावे. प्रकार तीन–एका बाजूला छिद्र असलेले, दोन्ही बाजूला छिद्र असलेले किंवा छिद्र नसलेले. छिद्र तीन अंगुळे लांब व अंगठ्याच्या मधल्या भागाइतके रुंद असावे. राहिलेल्या एक अंगुळात त्याच्या खाली अर्धा अंगुळ अंतरावर अर्धा अंगुळ वर उचलून आलेली वाटोळी पाळी ( कर्णिका ) दोन छिद्रांची करावी.दोन छिद्रांचे यंत्र विकार पहाण्याकरिता व दुसरे एक छिद्राचे यंत्र शस्त्र आणि क्षारकर्माकरिता. तिसरे छिद्ररहित यंत्र शमी नावाचे आहे ते मोड दाबण्याच्या उपयोगाचे असते.

एकच छिद्र असले तर नीट पाहता न आल्याने शस्त्रक्षार कर्म योग्य होणार नाही.

**–वर्त्मन्**–न., **नेत्ररोग० अयं नेत्रवर्त्मनि पिडकारूपो भवति। ताः पिडकाः ग्रीष्मकर्कटीबीजनिभाः मन्द-वेदनाः सूक्ष्माः खराः भवन्ति** (सुसू. ३.१३) डोळ्याच्या पापणीच्या आंत होणारी पुळी. ह्या पुळ्या उन्हाळ्यात होणाऱ्या काकडीच्या बीसारख्या होतात. त्या सूक्ष्म, खरखरीत असतात. वेदना सौम्य असतात.

**तत्स्वरूपम्-अन्तर्वर्त्म रक्तेन स्तब्धं स्निग्धं रक्तं सदाहरुक् स्रावि अधिमांसं जायते, विच्छिन्नं च विवर्धते,** (असंउ. १२); **साध्यः अयं व्याधिः,** (सुउ. १.४१); **अस्य चिकित्सा शुष्कार्शोवत् कार्या** (सुउ. १५.२९.)

स्वरूप–पापणीच्या आतला भाग रक्ताने स्तब्ध, स्निग्ध, तांबडे दाह वेदनायुक्त स्राव होणारे मांसांकुर वाढलेला, फाटे फुटून वाढतो. साध्य आहे. सुक्या मूळव्याधीसारखे उपचार करावेत.

**अर्शस्**–वि., **अर्शोरोगयुक्तो** (चसि. २.१८) **अर्शोरोगी,** (सुचि. ३२.१९) मूळव्याध असलेला रोगी.

**अर्हत्**–पु., **बुद्धः** (अहृसू. १८.१८.) बुद्ध.

**अर्हि**–स्त्री., **यत्र० यस्योपरि लोहादिकं संस्थाप्य घनेन संकुट्यते** (र. ७.५); **'ऐरण' इति लोके।** ऐरण.

**अल**–न., **खनिजधातुविष०, हरितालम्** (चचि. १७.७८); हरताळ.

**वृश्चिकलाङ्गूलम्** (सु. क. ३.५) विंचू इत्यादिकांचे शेपूट. नांगी.

**–गर्द**–पु., **सर्प० दर्वीकरः** (सुक. ४.३४ [१]) नाग-

**–(गर्दा)**–स्त्री., **जलूका० सविषजलौकानामन्यतमा सा रोमशा महापार्श्वा कृष्णमुखी च** (सुसू. १३.११.)

विषारी जळवांच्या जातीतील एक प्रकार. ही जळू लवयुक्त मोठ्या कुशीची काळ्या तोंडाची असते.

**–विष**–न., **विष० वृश्चिककण्टकविषम्,** विंचवाच्या नांगीतील विष.

**अल-आर-शब्देनात्र वृश्चिक-लाङ्गूलस्थितः ज्ञेयः,** (सुक. ३.५) नांगी. विंचवाच्या शेपटीचा काटा.

**–विषा**–स्त्री., **लूता० इयमुद्दिदा वायुरोगदा च भवति** (असंउ. ४४); **दंशलक्षणानि–दंशस्थाने पीतलोहितमण्डलाः पिटकाः सर्षपप्रमाणा भवन्ति तालुशोषज्वररुजाच्छर्दिदाहशिरःकम्पाः भवन्ति** (असंउ. ४५

एक विषारी किडा. जमिनीत होणारा. वातरोगक दंशलक्षणे–डसल्या जागेवर पिवळी तांबडी चकंद मोहरीसारख्या पुळ्या. ताप, वेदना, टाळू सुकर ओकारी, दाह, डोके कापणे.

**अलक**–न., **हरितालम्, तालम्** (र. २१.१३९) हरताळ.

**अलका**–स्त्री., **नगर० यक्षनगरी** (असंउ. ५) यक्षाची नगरी.

**अलकाधिपति**–पु., **कुबेरः** (सुक. ७.६१) कुबेर

**अलक्त**–न., **वनस्पति०, कुसुम्भम्** (ध. ६.११८

**–रस**–पु.. **अलक्तस्य रसः** (चचि. १७.१३२)

**अलक्तकरस–क्षौद्रेण श्रेष्ठः रक्तवान्तिहरः** (र. १४.२

कर्डई. अळिता. अळित्याचा रस मधाबरोबर रक्ता वांती नाहीशी करण्यात श्रेष्ठ.

**अलक्तक**–पु., न., **भैषज्य० लाक्षा०** (ध. ३.८२ लाख.

**कर्पटः वस्त्रम्** (सुसू. १२.९) वस्त्र, कापड.

**आर्द्रालक्तकः, आर्द्रकर्पटः** ओले फडके.

**अलक्ष्मी**–स्त्री., **तेजोहीनता, कान्तिहीनता, मालिन्य** (चसू. ५.९५

निस्तेजत्व, तेजोहीन, कान्ति नसलेला. मळकट.

**अलङ्करण**–न., **भूषाकरणम्** (चनि. ७.७ [१]) अलंकार घालणे, दागिने घालणे.

**अलजी**–स्त्री., **क्षुद्ररोग०, यवाकारा मांसाश्रि घना अवक्त्रा कफवाताभ्यां जायमाना पिड** (असंउ. ३६) एक पुटकुळीसारखा रोग.

**'अन्धालजी' नाम्ना सुश्रुते 'अन्त्रालजी' ना माधवनिदानेऽस्या निर्देशः** (सुनि. १३.६)

जवासारखी मांसाश्रयी घट्ट तोंड नसलेली क वातापासून झालेली पुळी; अंधालजी, अंत्रालज हिला म्हणतात.

**प्रमेहपिडका** (चनि. ४.४८)

**एषा स्फोटवती दारुणा ताम्रा सशूला परिस्रुत बहिर्मार्गाश्रिता पिटका रक्तोल्बणा साध्या अ मेदस्कप्रमेहपीडितेषु जायते** (सुनि. ६.१८, चचि. १२.८ (चसू. १७.१०६, चसू. ११.४

**विना प्रमेहमपि एषा दुष्टमेदसो जायते** (चसू. १७.१०

यथा बालानां तेषु एषा बहूपद्रवा आशुपाका विसर्पवती च भवति ( काचि. द्विव्रणीय )
भेद्यपिडकेयम् ( सुसू. २५.६ )
प्रमेह, मधुमेह यांत अंगावर फोडा सारख्या अनेक आकाराच्या लहान मोठ्या पुळ्या अशा पुळ्यांपैकी एका जातीच्या पुळीला 'काळपुळी' असे म्हणतात. ही फोडांनी युक्त, कठीण, तांबडी, शूलयुक्त, अग्रस्रावी, रक्तदोष अधिक असणारी, साध्य असून थोडा मेद असलेल्या प्रमेही रोग्याला होते. प्रमेह नसतानाही ही मेददुष्टि असलेल्याला होते, मुलांना ही लवकर पिकणारी पुष्कळ उपद्रवांनी युक्त व पसरणारी होते. हिचा भेद करूनच बरी करता येते.
**शूकदोष०** **दुष्टशूकावचारणात् लिङ्गे जायमाना प्रमेहपिडकालजीलक्षणैर्युक्ता** (सुनि. १४.७) '**प्रमेहदोषजा अधःकाये विशेषेण शूकदोषजा लिङ्गे' गयदासः ।**
लिंग वाढविण्याकरिता केलेल्या चुकीच्या उपचारांनी लिंगावर व प्रमेहाने खालच्या अवयवावर पुळी होते. प्रमेहात होणाऱ्या अलजीची लक्षणे दिसतात.
**नेत्रसंधिगतरोग०**, ( सुउ. २.३ )
**ताम्रतादाहशूलतोदाश्रुसंकुलतादिपर्वणीलिङ्गैरुपेता इयं पिडका शुक्लकृष्णसंधौ भवति ।** ( सुउ. २.८ )
**पर्वण्यलज्योः स्थानलक्षणयोरैक्येऽपि तनुत्वस्थूलताभ्यां भेदः, तन्वी पर्वणी स्थूला पुनरलजी, असाध्यश्च** ( सुउ. १.३९ )
डोळ्याच्या मध्ये होणारी पुळी. पांढरे व काळे बुबुळाच्या सांध्यावर ही होते. तांबडी, दाह, शूल, टोचणी, आसूंचा भर. पर्वणी रोगासारखी होते. पर्वणी पातळ पण अलजी स्थूल जाड. ही असाध्य.
**नेत्रवर्त्मगतरोग०, कनीनिके वर्त्मनोर्बहिर्भागे पक्वो रक्तपूयस्रावी ग्रन्थिरयम् स्रुतः सन् मुहुर्मुहुराध्मायते** ( अहउ. ८.२३ ) **भेद्योऽयं रोगः**
( अहउ. ८.२७ )
डोळ्याच्या पोटाच्या बाहेर होणारी पुळी. ही गाठ पिकते, रक्त पू स्रवतो, पुन्हा सांचतो. हा शस्त्राने फोडण्याचा एक रोग आहे.

**अलम्बुषा**–स्त्री., **वनस्पति०, लज्जालुकाभेदः** ( असंचि. १० ) लाजाळूचा एक प्रकार.
**महाश्रावणी, महामुण्डीका,** ( असंचि. १० ) **'गोरखमुण्डी' इति लोके ।** गोरखमुंडी, महामुंडी.

**अलर्क**–पु., रोग० **सारमेयदष्टस्य ज्वररोगः "अलर्कः कुक्कुरेषु"** ( असंउ. ४६.१ )
**उन्मत्तकुक्कुरः उन्मत्तशृगालतरक्षवृक्षव्याघ्रादयो वा,** ( सुक.७.६२ ) **तल्लक्षणम्–शुनः श्लेष्मोल्बणा दोषाः संज्ञावहाः सिराः श्रिताः संज्ञां मुष्णन्तः तस्य धातूनामतिदारुणं क्षोभं कुर्वते । तेन स सारमेयो लालावान् अन्धो बधिरः नताननः स्रस्तपुच्छहनुस्कन्धश्च सन् सर्वतोऽभिधावति ।**
( असंउ. ४६ ) ( सुक. ७.४३–४५ )
पिसाळलेल्या कुत्र्याच्या दंशामुळे ताप. अलर्क म्हणजे पिसाळलेला कुत्रा. त्याचे लक्षण कफाधिक दोष संज्ञावाही धमन्यांचा व धातूंचा क्षोभ करतात त्यामुळे कुत्रा इत्यादी प्राणी आंधळे बहिरे खाली मान घातलेले हनुवटी खांदे शेपूट गळालेले लाळ गळत सर्वत्र धावतात.
**वनस्पति०, अर्कः,** ( ध. ४.१६ ) रुई.
**श्वेतार्कः, मन्दारः** ( चसि. १०.२३ ) **राजार्कः** ( ध. ४.१६ ) पांढरी रुई, मंदार.

**–जुष्ट**–वि., **उन्मत्तकुक्कुरादिना दष्टः** ( सुक. ७.६१ ) पिसाळलेला कुत्रा इ० ज्याला चावला आहे तो.

**–विष**–रोग, **उन्मत्तकुक्कुरदंष्ट्राविषम्,** ( सुक. ७.५८ ), **लक्षणम्–एतेन हृद्रोगः शिरोरोगो ज्वरः स्तम्भतृष्णामूर्च्छाश्च भवन्ति । स्रुतः कृष्णमसृक् क्षरति** ( असंउ. ४६ )
**असाध्यलक्षणम्–यस्य कुक्कुरदष्टस्य विषं स्वयं कुप्येत्, स न जीवति ।** ( सुक. ७.५८ ),
**येन दष्टः तच्चेष्टारुतं कुर्वन्नादर्शसलिलादिषु तमेव चाकस्मात् पश्यन् विनश्यति ।** ( असंउ. ४६ )
**उपद्रवः–अलर्कविषे भूतानुबन्धो भवति** ( सुक. ७.५९ ) **चिकित्सा–दंशस्थाने उष्णसर्पिषा दाहः । अगदैश्च प्रदेहः । पुराणघृतपानं देयम्**
( असंउ. ४६ )
**भूतानुबन्धनाशार्थं दैवव्यपाश्रयचिकित्सा कार्या ।**
( सुक. ७.५९ )
**पिसाळलेल्या कुत्र्याच्या दाढेतले विष**–याने हृदयाचे, डोक्याचे रोग, ताप, तहान, मूर्च्छा, ताठरपणा, हे उपद्रव होतात. दंशाच्या व्रणातून काळे रक्त स्रवते व स्पर्शज्ञान नाहीसे होते. **असाध्य लक्षण**–ते विष प्रकुपित होऊन चावलेल्या कुत्र्यासारखी धावाधाव करू लागला तसेच आरसा पाणी यात जो त्या कुत्र्याला पहातो ते अशुभ लक्षण होय; तो

रोगी मरतो. **उपद्रव**–कुत्र्याच्या विषाने भूतानुबंध होतो. **उपचार**– दंशाची जागा गरम तुपाने जाळावी. विषनाशक लेप लावावा. जुने तूप पाजावे. भूताचा जो संसर्ग असतो तो नाहीसा करण्याकरिता होम इत्यादी उपचार करावे.

**अलवणा**–स्त्री., ज्योतिष्मती ( सुसू. ३८.१६ )
मालकांगोणी.

**अलस**–वि., **निश्चलः, गतिहीनः,** ( अहसू. ८.११ )
पु., **क्षुद्ररोग०, अस्मिन् दुष्टकर्दमसंस्पर्शात् शोणितकफदोषाच्चाङ्गुल्यः व्रणकण्डूक्लेदान्वितान्तराः भवन्ति** ( सुनि. १३.३२ असंउ.३६ )
स्थिर, न हालणारा (व्रण) यात विषारी चिखलाच्या स्पर्शाने अंगुळीच्या बेचक्यात व्रण होऊन कफ रक्त दुष्टीने खाज येते व स्राव होतो.
चिखली. दुष्ट चिखलाने बोटाच्या बेचक्यात होणारा व्रण.

**अलसकः**–**अजीर्णजन्यरोग०,** ( अहसू. ८.१२ )
तीव्राजीर्णाने होणारा रोग.
**लाघर–लाघरव–लाघरको ज्वरांगमर्दभ्रमसादतन्द्राक्षयान्वितो कुम्भकामलानामा पाण्डुरोगभेदः,** ( सुउ. ४४.६-१२ )
**हलीमकः, पाण्डुरोगभेदः,** ( असंनि. १३ )
कुंभकामला नांवाचा पांडुरोगाचा एक प्रकार. ज्वर, अंगदुखी, भ्रम, झापड, क्षय, गळाठा ही चिन्हे होतात. लाघर, लाघरव, लाघरक ही त्याची दुसरी नावे आहेत.
**अलासः, जिह्वागतरोग०,** ( असंउ. २५ )
जिभेचा रोग.
**मूषिक०,** ( सुक. ७.४ ), **तद्दष्टलक्षणम्–दंशे रुजा ज्वरः ऊर्ध्ववायुर्ग्रीवास्तम्भश्च** ( सुक. ७.१८ )
एक उंदीर. दंशाच्या जागी वेदना, ज्वर, वायु वर जातो, मान ताठरते.

**अलसक**–वि., **मन्दगतिः** ( चचि. २१.३८ )
ज्याची गति मंद आहे असा.
पु., **अजीर्णरोग०, निरुक्तिः–**
**"प्रयाति नोर्ध्वं नाधस्तादाहारो न च पच्यते ।
आमाशयेऽलसीभूतस्तेन सोऽलसकः स्मृतः"**
( असंसू. ११ )
अजीर्ण रोगाचा प्रकार. या अजीर्णाच्या प्रकारात अन्न उलटीने तोंडातून बाहेर जात नाही. किंवा अतिसार होऊन खालूनही बाहेर जात नाही आणि पचतही नाही आळश्यासारखे पडून रहाते.
**लक्षणम्–आमदुष्टिजन्यश्छर्द्यतीसाररहितोऽन्तर्मार्गजोऽयं व्याधिः । संप्राप्तिः–दुर्बलस्याल्पाग्नेर्बहुश्लेष्मणो वातमूत्रपुरीषवेगविधारिणः स्थिरगुरुबहुरूक्षशुष्कान्नसेविनस्तदन्नपानमनिलप्रपीडितं श्लेष्मणा च विबद्धमार्गमतिमात्रप्रलीनमलसत्वान्न बहिर्मुखीभवति, ततश्छर्द्यतीसारवर्ज्यान्यामप्रदोषलिङ्गान्यतिमात्राण्यभिदर्शयति ।** ( चवि. २.११ )
**शूलादीन्युपजनयत्यतिमात्राणि** ( असंसू. ११ )
**कुक्षावानाहः प्रतमनं निरुद्धवायोरितस्ततो धावनमधोवातनिरोधः पुरीषाप्रवृत्तिस्तृष्णावरोध उद्गारावरोधोऽन्त्रकूजनमार्तस्येव दुःखशब्दश्चेत्येतानि लक्षणानि** ( सुउ. ५६.७–८ )
**साध्यासाध्यता–नैकदोषोद्भवः कृच्छ्रसाध्यः** ( सुउ. ५६.३ ड. )
**बाल–अलसकलक्षणम्–'शिरो न धारयति यो भिद्यते जृम्भते मुहुः । स्तनं पिबति नात्यर्थं ग्रथितं छर्दयत्यपि ॥ विषादाध्मानारुचिभिर्विद्यादलसकं शिशोः ॥** ( कासू. २५.२७–२८ )
**संप्राप्ति**–दुर्बल, अग्नि मंद असलेला, कफाधिक्य झालेला, वात, मूत्र, पुरीष वेग धारण करणारा, घट्ट, जड, पुष्कळ, रुक्ष व कोरडे अन्न सेवन करणारा, अशा व्यक्तीचे अन्नपान वातदुष्ट होऊन कफाने मार्ग अडल्यामुळे व तेथेच विलीन आणि हालचाल रहित झाल्यामुळे शरिराबाहेर जात नाही, यामुळे वांती व अतिसार या वाचून आमदोषाची सर्व लक्षणे पुष्कळ प्रमाणात होतात. शूल वगैरेही फार होतो, पोट फुगते, जीव घाबरतो, खाली जाणारा वायु अडल्यामुळे इतस्ततः जातो व खालील मार्गाचा अवरोध होऊन मलप्रवृत्ति अडते, तहान, व ढेकर ह्या क्रिया अडतात, आतड्यात गुरगुर, एखाद्या अतिदुःखी व्यक्तीसारखे बोलतो.
**साध्यासाध्यता**–एक दोषापेक्षा अधिक दोषांची दुष्टि असलेला हा रोग कष्टसाध्य असतो.
वालकांचा अलसक विकार लक्षणे–मूल डोके धरू शकत नाही, त्याला आपले आंग फुटत आहेसे वाटते, ते वारंवार जांभया घेते, विशेष स्तनपान करीत नाही, वांती गाठाळल्या सारखी होते. खिन्नता, पोट फुगणे, आणि अरुचि त्या लक्षणांवरून विकार ओळखावा.

न., क्षुद्रकुष्ठरोग०, **तच्च वातकफाधिकम्** ( चचि. ७.२९ )
**कण्डूमद्भिः सरागैर्गण्डैः संयुक्तम्** ( चचि. ७.२३ )
क्षुद्र कुष्ठ प्रकार. खाजवणारे, लाल फोड असलेला कुष्ठ प्रकार.

**अलसल**–न., **निश्चलता** ( असंसू. ११ ) स्तब्धता.

**अलसान्द्र**–पु., **शिम्बिधान्य० राजमाषः चवलः (हेमा)** 'चवळी' इति लोके; गुणाः–**कषायरसप्रभावान्नपुरीषभेदी न मूत्रलो नैव कफस्य कर्ता रसे पाके च मधुरः सन्तर्पणः स्तन्यकरो रुचिप्रदश्च** ( सुसू. ४६.४५ ) चवळी.
**चवळीचे गुणधर्म**–तुरट रसामुळे मलाचा भेद करीत नाही, मूत्रल नाही, कफही वाढवीत नाही. रस आणि विपाक मधुर आहे. तृप्तिकारक, दूध उत्पन्न करणारी व रुचकर आहे.

**अलसीभूत**–वि., **स्त्यानो विष्टब्धः** ( चवि. २.१३ ) न हालणारा. स्तब्ध. निश्चल.

**अलाघव**–न., **रोगलक्षण० गौरवम्, लाघवस्याभावः** ( चसू. १४.२० ) जडपणा. हलकेपणा नसणे.

**अलातवर्ण**–**अलातस्तप्ताङ्गारः तस्य वर्णो यस्मिंस्तत्** ( चइ. ३.६ )
विस्तवासारखा–निखाऱ्यासारखा ज्याचा वर्ण आहे.

**अलाबु ( बू )**–स्त्री., न., **वल्लीफलशाक०** ( चसू. २७.११२ )
**दीर्घवर्तुलादिभेदादनेकविधा** ( सुसू. ४६.२.१५ )
**गुणाः–मधुराऽतिशीतला रूक्षा गुर्वी भिन्नविट्का च ।**
दुध्या पोपळा. दीर्घ वर्तुळ, गोल, इत्यादी अनेक आकाराचे. गुण–गोड, अति थंड, रूक्ष, जड, मळ फोडणारा.
न., पु., **नाडीयन्त्रम्** ( सुसू. ७.१३ ) तुंबडी.
**यन्त्रार्थे अलाबु कटुकं प्रयोजयेत्** ( सुसू. १३.७ )
**अवगाढत्वचि स्थितसुप्तकफदुष्टशोणितनिर्हरणार्थम् इदं यन्त्रमुपयुज्यते** ( सुशा. ९.२५.२६ ) ( अहृसू. २६. ५४ सुसू. १३.४ )
**यन्त्रस्वरूपम्–द्वादशाङ्गुलदीर्घोऽष्टादशांगुलपरिणाहस्त्रिचतुरङ्गुलवृत्तसमुच्छ्रितमुखः** ( असंसू. ३४ )
**कार्यपद्धतिः–परिवेष्टितप्रदीप्तकुशजपिचुगर्भश्च प्रयोज्यः ।** ( असंसू. ३४ )
**सान्तर्दीपया मध्यदीपसहितया अलाब्वा शोणितावसेचनं कार्यम् ।** ( सुसू. १३.८ )
एक नाडीयंत्र; यासाठी कडु भोपळा उपयुक्त. त्वचेत खोल असलेला दुष्ट कफ व रक्त काढण्याकरिता हे यंत्र (तुंबडी) उपयुक्त, स्वरूप–बारा अंगुळे लांब, आठ अंगुळे घेर व तीन चार अंगुळे गोल तोंड असलेली. कार्यपद्धति–आत दर्भाची पुरचुंडी कापूस इत्यादी पेटवलेली वस्तु ठेवून किंवा आत दिवा ठेवून तुंबडी लावावी, म्हणजे रक्तस्राव होईल.
**–शकल**–न., **तुम्बीफलकर्परिका, व्रणबन्धनद्रव्येष्वेकम्** ( सुसू. १८.१६ )
व्रणबंधन साधनांपैकी एक साधन, दुध्या भोपळ्याचे कपटे. तुकडे.

**अलाम्बु**–स्त्री., **क्षीरतुम्बी** ( रा. ७.२३९ ) दुध्या भोपळा.

**अलास ( अलस )**–पु., **जिह्वागतरोग०**, ( सुनि. १६.३८ )
**अयं जिह्वायास्तलेऽधोभागे प्रगाढशोफः कफपित्तरक्ताज्जिह्वास्तम्भकर उन्नतः पक्वो मांसशातनो मत्स्यगन्धिर्भवेत्** ( अहृउ. २१.३३ )
जिभेच्या खाली तळाशी खोल अशी आलेली सूज, कफपित्त व रक्तदोषामुळे जीभ ताठ करणारी उंच, पिकून मांस झडत असणारी व माशांसारखी घाण येणारी सूज.
**त्रिदोषजोऽयमसाध्यः** ( सुनि. १६.३८ ड. )
**चिकित्सासूत्रम्–नवोत्थिते तीक्ष्णाः प्रतिसारणा देयाः सिरावेधनं च, न चात्र शस्त्रमवचारयेत् ।** ( असंउ. २६ )
हा रोग त्रिदोषाचा. नव्या रोगावर तीक्ष्ण औषधे सारवावीत, शीर तोडून रक्त काढावे, शस्त्राने कापू नये.

**अलि**–पु., **कीट०, वृश्चिकः** ( असंउ. ४२ ) विंचू.
**वनस्पति०, भृङ्गराजः** ( र. २९.४४ ) माका.
स्त्री., **वृश्चिकाली** ( र. २९.४४ )
विंचवी, मेढशिंगी.
**अमरवल्ली**–( र. २१.३३ ) अमरवेल.
**–कुलसंकुल**–पु., **वनस्पति०, कुब्जकः** ( रा.१०.२४८ ) कांटेशेवती.
**–दूर्वा**–स्त्री., **तृण०, मालादूर्वा० द्रष्टव्या 'दूर्वा'** ( रा. ८.२३२ ) दूर्वांचा एक प्रकार, पहा 'दूर्वा'
**–नीलकेश**–वि., **भृङ्गवर्णवन्नीलकेशः श्लेष्मप्रकृति–**
**–लिङ्गम्**–( सुशा. ४.७३ )
काळ्या केसांचा. कफ प्रकृतीचे एक चिन्ह.

**–पत्रिका**–स्त्री., **वनस्पति०** ( रापरि. ५.४० )
चिंचुवा.

**–पर्णी**–स्त्री., **वनस्पति०, वृश्चिकाली** ( रापरि. ९.७ )
विंचवी.

**–मोहनी**–स्त्री., **वनस्पति०, केविका** ( रापरि.१०.३३ )
तेजस्वी फुलांची जोड फळांची वनस्पती केवार ( कोकणांत )

**–स्कन्ध**–पु., **वनस्पति०, कुलित्थः** ( ध. ६.१०५ )
कुळीथ.

**अलिका**–स्त्री., **वनस्पति०, भृङ्गराजः** ( र. २.६८ )
माका.

**अलिङ्ग**–वि., **यस्य लिङ्गं न विद्यते सः** ( सुशा. १.९ )
ज्याला कोणतेही लिंग नाही तो.

**अलिञ्जर**–पु., **बहुजलधरपात्रम्** ( असंचि. ९. )
पुष्कळ पाणी मावणारे पात्र.

**अलोचन**–वि., **निर्जालका ( कुटिः )** ( चसू. १४.५२ )
जिला जाळी–खिडकी नाही अशी झोपडी.

**अलोड्य**–वि., **अक्षोभ्यम् (अक्षरम्)** ( चशा. ३.८ )
न हलण्या सारखे, क्षुब्ध न होणारे नष्ट न होणारे.

**अल्प**–वि., **यथोचितप्रमाणहीनम्** ( सुचि.३६.११ )
प्रमाणापेक्षा कमी, थोडे.

**–कायत्व**–न., **शरीरस्य अल्पप्रमाणत्वम्** ( सुसू. ४५.५६ )
शरीर लहान असणे. बुटके शरीर, बुटकेपणा.

**–क्षीरा**–वि., **अल्पं क्षीरं यस्याः सा** (काश्यपसू.लेहाध्याय) जिला थोडे दूध आहे अशी.

**–दोषेन्धन**–वि., **अल्पं दोषस्वरूपमिन्धनं यस्य सः** ( सुउ. ३९.६५ )
ज्याला दोषरूपी इंधन–जळण थोडे आहे असा अग्नी.

**–निद्रता**–स्त्री., **रोगलक्षण० निद्राल्पत्वम्** ( अहृसू. ११.७ ) अपुरी–थोडी झोप असणे.

**–पत्रिका**–स्त्री., **अपामार्गभेदः क्षुद्रापामार्गः** ( रा. ४.३९ ) लहान जातीचा आघाडा.

**–प्राण**–वि., **कायवाङ्मानसीषु क्रियास्वल्पशक्तिः अल्पबलः** ( सुसू. १५.३३ )
कमी शक्तीचा, कायावाचा मनाच्या क्रियात थोडी शक्ति असलेला. कमी जीवन शक्तीचा. जीवनशक्ति कमी असणे.

**–प्राणता**–स्त्री., **लक्षण० मानसबलहानिः मांसापचयः क्रियास्वशक्तिः** ( चनि. १.३३ )
मनाच्या बलाचा नाश, मांसाची क्षीणता, कृश होण्याकडे प्रवृत्ति. कोणत्याही कामामध्ये दुर्बलता.

**–प्राणत्व**–न., **लक्षण० अल्पशक्तित्वम्** ( सुसू. १५.३३ )
थोडी शक्ति असणे. जीवन शक्ति कमी असणे.

**–बलत्व**–न., **लक्षण० उत्साहहानिः** ( सुसू. १५.३३ )
थोडे बल असणे. उत्साह कमी होणे.

**–बस्तित्व**–न., **आयामे बस्तेरल्पत्वम्** (सुनि. ३.११)
लहान बस्ति असणे.

**–मेदस्क**–वि., **लक्षण० क्षीणमेदस्कः** ( चचि. १६.६ )
मेद थोडा आहे असा. क्षीण मेदाचा.

**–रक्त**–वि., **लक्षण०, क्षीणरक्तः** ( चचि.१६.६ )
रक्त क्षीण असलेला.

**–रेतस्**–वि., **लक्षण० अल्पशुक्रः क्षीणवीर्यः** ( सुचि. २६.४ ) शुक्र क्षीण–शुक्र अल्प असलेला. **( परिव० ) प्रकृत्यैव स्तोकरेताः** ( सुसू. १.८ [८] )
मूळचाच शुक्र कमी असलेला. शुक्र असार.

**–वह्नि**–वि., **लक्षण० अल्पाग्निः** ( अहृसू. ८.१० )
ज्याचा अग्नी अल्प आहे असा.

**–वेगता**–स्त्री., **लक्षण० मंदगतित्वम् यथा पक्वशोफे** ( अहृसू. २९.५ )
ज्वरादिकांचा वेग कमी होणे. जसे सूज पिकली की ज्वर सौम्य होतो.

**–शुक्रता**–स्त्री., **लक्षण० शुक्रहीनता** ( सुशा. ६.२४ )
शुक्र क्षीण होणे–असणे.

**–सत्त्व**–वि., **लक्षण० अल्पमनोबलः** ( चचि. ९.५) ( असंसू. २३ ) दुबळ्या मनाचा.

**–साधन**–वि., **अल्पभेषजः** ( चवि. ८.११८ )
औषधे इत्यादी चिकित्सेची साधने थोडी असलेला.

**अल्पाभिष्यन्दिन्**-वि., **गुण० दोषधातुमलस्रोतसां मंदक्लेदप्राप्तिजनकम्** ( सुसू. ४५.५० )
स्रोतसांत थोड्या प्रमाणात ओलावा निर्माण करणारे.

**अल्पायुस्**–वि., **अदीर्घायुः** ( सुसू. ३५.४ )
**लक्षणानि–पर्वाणि ह्रस्वानि मेहनं सुमहद् उरसि अनुलोमप्रतिलोमावर्त–मनायतं पृष्ठं श्रवणौ स्थानात् ऊर्ध्वौ नासिका उच्चा, हसतो जल्पतो च दन्तमांसप्रदर्शनं भ्रान्तवद्दर्शनं पञ्चविंशतिवर्षाणि जीवति** ( सुसू. ३५.४ ९–११ )
थोडे आयुष्य असणारा. लक्षणे–पेरी लहान, लिंग मोठे, छातीवर उलट सुलट केसांचा भोवरा, पाठ अरुंद, कान व नाक त्यांच्या स्थानापेक्षा वर उंच

असणे, हसता बोलता दाताच्या हिरड्या दिसणे, भ्रांतिष्ठासारखी दृष्टि असणे, अशा लक्षणांचा मनुष्य २५ वर्षे आयुष्याचा समजावा.

**अल्पक**–पु., **वनस्पति०, धन्वयासः** (रा. ३.२५) धमासा.

**अल्पास्थि**–न., **परूषकम्** ( रा. ११.८४ ) फालसा.

**अल्पीयःखा**–वि., **लक्षण०, अल्पतरयोनिद्वारा, अल्पतरं खं योनिमुखं यस्याः सा** ( सुनि. १३.५० ) **कन्या ह्यनार्तवाऽल्पीयःखा भवति, ( मधुकोशः )** फार लहान योनिद्वार असलेली कन्या. लहान योनिद्वाराची व रजःस्राव थोडा असलेली अशी असते.

**अलुका**–स्त्री., **वनस्पति०, धान्यकम्** (ध. २.६३) धणे.

**अवकर**–पु., **विष्किरपक्षि०** ( चसू. २७.४९ ) उकरून भक्ष्य खाणाऱ्या ( कोंबडा इ० ) पक्ष्यांपैकी एक.

**अवकाशकर**–वि., **स्रोतोविकासी** ( चसू. २६.४३ (३) स्रोतसांचा विकास करणारे; स्रोतोरोध नाहीसे करणारे.

**अवकुश**–पु., **पर्णमृग०, गोलाङ्गूलः वानरः** ( सुसू. ४६.७६ ) वानरजातीय एक प्राणी. पाने खाणारा. **जलजप्राणि०** ( काखिल. २४.५३ ) जलात उत्पन्न होणारा एक प्राणी.

**अवकूलन**–( **परिव०** )न., **पाचनम्, अग्नावुष्णीकरणम्** ( सुउ. ४०.८२ ) पचन करणे, शिजवणे. अग्नीवर उष्ण करणे, उकळणे.

**अवक्रान्ति**–स्त्री., **अवतरणम्, उत्पत्तिः संप्राप्तिः स्वरूपलाभः** ( सुशा. ३.१ ) ( चशा. ३.१ )( अहृशा. ) ( १.१ ) ( असंशा. २.१ ) अवतरणे, निर्माण होणे, प्राप्त होणे, स्वरूप प्राप्त होणे,

**अवक्षिप्त**–न., **संधिमुक्तप्रकारः, सन्धिविश्लेषस्तीव्रा च रुक्** ( असंउ. ३२ ) ( सुनि. १५.७ ) निखळलेल्या सांध्याचा एक प्रकार; त्याबरोबर तीव्र दुःख असते.

**अवक्षिप्त-त्व**–न., **तिर्यक्क्षिप्तत्वम्** ( सुसू. ३२.४) सांधा तिर्कस ढळणे–निखळणे.

**अवक्षुत**–न., **छिक्का** ( चइ. १२.२६. ) शिंक.

**अवक्षोदन**–( **परिव०** ) न., **सुष्टु चूर्णीकरणम्** (सुचि. ४.२८) चांगले चूर्ण करणे. सूक्ष्म चूर्ण करणे.

**अवगाढ**–वि., **अभ्यन्तराश्रयम्** ( सुशा. ८.२६) **गम्भीरम्** ( सुचि. १. १३१. ) **अभ्यन्तरमूलम्** ( सुनि. १०.६ ) आत खोल असलेले. ज्याचे मूळ आत आहे असे.

–**दोष**–वि., **रोगलक्षण० अभ्यन्तरपूयम्** ( सुसू. १७.१४ ) आत–खोल पू असलेला. (शोथ)

–**पद**–अ., **बहुप्रविष्टशस्त्रपदम्** ( असंउ. २८ ) जरुरीपेक्षा शस्त्राचे अधिक आत जाणे, शस्त्राने वाजवीपेक्षा अधिक कापणे.

**अवगाह** –पु., **चिरं जलावस्थानम्** ( चसू. ६.४७ ) दीर्घ काल पाण्यात डुंबणे. **स्नानम्** ( चसू. १.११२ ) स्नान. **द्रवपूर्णभाजने निमज्जनम्** ( सुउ. ३९.२७४ ) पाणी असलेल्या भांड्यात बसणे–असणे. **द्रवस्वेदप्रकारः, अवगाहस्वेदः** ( असंसू. २६ ) **यथा क्षीरतैलघृतपिशितरसोष्णसलिलकोष्ठावगाहः** ( चसू. १४.४५ ) द्रव द्रव्याने घाम काढण्याचा प्रकार. वाफारा. गरम दूध–तेल– तूप, मांसरस, अथवा ऊन पाण्याच्या कोठीत बसणे.

–**स्वेद**–पु., **उपक्रम० अवगाहनेन स्वेदः** ( अहृसू. १७.११ ) गरम दूध–तेल–तूप, मांसरस, पाणी इत्यादीमध्ये बसणे–असणे, त्यांचा शेक घेणे.

**अवगाहन**–न., **मज्जनम्** ( सुचि. २४.३३ ) बुडणे. **उपक्रम० तैलघृतपयःक्वाथपूरितद्रोण्यां शरीरावयवस्य मज्जनम्** ( चचि. २८.१०९ ) गरम तेल–तूप–दूध–काढा असलेल्या डोणीत शरीरशरिराचा अवयव बुडविणे.

**अवगुण्ठन**–न., **उपक्रम०, अक्ष्णश्चूर्णवस्त्रादिभिराच्छादनम्** ( असंउ. १९ ) एक उपचार. सूक्ष्म चूर्ण वस्त्रादिकात बांधून डोळ्यावर ठेवणे.

**अवंगुत्थ**–न., **शाक० वेगनामा, काकादनीत्यर्थः** ( सुसू. ४६.२२१ ) गुंजा.

**अवघट्टन**–न., **ताडनम्** ( सुशा. ८.१९ ) कुटणे.

**अवघातक**–पु., **आरग्वधः** ( चक. ८.३ ) बहावा.

**अवचारण**–( **परिव०** ) न., **योजना, उपयोगः** ( सुचि. २९.१२ ) योजणे, उपयोग करणे.

**अवचूर्णन**–न., **चूर्णस्य विकिरणम्** ( चचि. ७.१०४ ) चूर्ण भुरभुरणे, पसरणे. **व्रणोपक्रमः** ( सुचि. १.८ ) व्रणाची एक चिकित्सा. **व्रणोपरि चूर्णप्रक्षेपः** ( सुचि. २१.३ ) व्रणावर चूर्ण विखुरणे.

**स च शोधनरोपणभेदेन द्विविधः** ( सुचि. १.७४ )
( सुसू. ३८.१९, २७–२८ )
व्रणाची शुद्धि करणे व व्रण रुझवून आणणे असे दोन प्रकार.

**अवचेष्टित**–न., **कर्म० उत्थानचङ्क्रमणादि** ( सुउ. ३९.१६३ )
उठणे चालणे इत्यादी शरिराची हालचाल.

**अवच्छादन**–न., **लेपनमुद्वर्तनं वा** ( चचि. २३.१७४ )
लेप करणे किंवा उटणे लावणे.

**अवजृम्भण**–न., **रोगलक्षण०, आकुञ्चनं प्रसारणं वा** ( चशा. ८.२७ )
**गात्रप्रसारणम् (चक्रः) (परिव०)** ( चशा.८.३८
अवयव आखुड करणे. आखडून घेणे किंवा पसरणे) अवयव पसरणे.

**अवट**–पु., **गर्तः** ( सुउ. २९.८ ) खड्डा.

**अवटु**–पु., **शारीर०, ग्रीवायाः पश्चिमो भागः** ( सुउ. ६.२७ )
**कृकाटिकाभागसन्धौ गर्तः** ( सुचि.३ .३८ )
पु., **गर्तः** ( सुसू. ३५.१२ )
मानेचा मागचा भाग. खड्डा. गळ्यांतील हाडाच्या संधीजवळ असलेली खाच.

**अवडीन**–न., **पक्षिणोऽवक्षेपणम्** ( काइ. १९ )
पक्ष्यांची खाली झेप घेणे.

**अवतत**–वि., **व्याप्तम्** ( सुउ. ५७.३ ) व्यापलेले.

**अवतरण**–न., **प्रवेशः** ( सुचि. २४.९१ ) प्रवेश करणे.

**अवतारगवेषिन्**–वि., **छिद्रान्वेषी** ( असंउ. ७ )
छिद्र पाहणारा. व्यंग पाहणारा.

**अवदंश**–पु., **पानरुचिजननार्थं यद् व्यञ्जनं भक्ष्यते तत्** ( चचि. २४.१८ )
पेयाची रुचि होण्यासाठी चटणी इ० तोंडी लावणे.

**–क्षम**–वि., **रुचिजनने समर्थः** ( चसू. २७.१४५ )
रुचि उत्पन्न करण्यासारखे, रुचकर.

**शिग्रुः** पु., ( ध. ४.३९ ) शेवगा ( गोडा )

**अवदरण**–न., **रोगलक्षण०, विदरणम्** ( सुनि. ६.१३ )
फाटणे. भेगा पडणे.

**अवदात**–पु., **गौरः** ( चशा. ८.९ ) गोरा ( रंग ).

**–वर्ण**–वि. **गौरवर्णः, पीतवर्णः** ( चशा. ८.१५ )
गोरा वर्ण, गोरा रंग, पिवळा वर्ण.

**अवदानवचन**–न., **प्रशस्तवचनम्** ( कासू. २८.५ )
'चांगले बोलणे.

**अवद्य**–वि., **निन्द्यम्** ( असंनि. ६ ) निंद्य, वाईट.

**अवधूनन**–न., **उत्क्षिप्य चालनम्** ( सुचि. ३६.१३ )
वर उचलून चालणे, हालवणे.

**अवनतशिरस्क**–वि., **अवनतं शिरो यस्मिँस्तत्** ( चशा. ८.२४ )
ज्यांत शिर खालच्या पातळीवर राहील असे शयन–अशी शय्या–अशी खाट.

**अवनद्ध**–वि., **वेष्टितम्** ( चचि. १.७५ )
वेष्टिलेला. गुंडाळलेला. वेढलेला.

**अवनाम**–पु., **अवनमनम्** ( असंशा. ८ )
खाली वाकणे, खाली लवणे.

**अवनामित**–वि., **अधोगतम्** ( सुचि. ३.१६ )
खाली गेलेले.

**अवनिप्रदेश**–पु., **भूमिप्रदेशः** ( सुचि. ४.२९ )
जमिनीचा भाग.

**अवनी**–स्त्री., **वनस्पति०, त्रायमाणा** ( रा. ५.३७९ )
त्रायमाण.

**अवनुन्नत्व**–न., **प्रेरितत्वम्** ( चनि. १.२१ )
प्रेरणा देणे. चालना देणे.

**अवन्ति**–स्त्री., **मालवप्रदेशः, मालवाः** ( अहसू. ५.११ )
माळवा.

**–सोम**– न., **काञ्जिकम्** ( चचि. १९.२६ ) कांजी.

**अवन्ध्य**–वि., **सफलम्** ( अहशा. १.२८ ) सफल.

**अवन्ध्या**–स्त्री., **कर्कोटकी** ( ध. १.१८७ ) कर्टोले.

**अवपतित**–वि., ( **परिव०** ) **ग्राम्यम्** ( चवि. ८.३ )
गांवठी, गांवढळ.

**अवपाटन**–न., **शस्त्रकर्म०** ( र. २५.१२ )
**विदारणम्** ( सुनि. १३.५० ) कापणे. फाडणे.

**अवपाटिका**–स्त्री., **क्षुद्ररोग० मेढ्रचर्मावपाटनजन्यविकारः लक्षणम्–यदा नरोऽल्पीयःखां कन्यां स्त्रियं वा हर्षाद्बलाद्वा गच्छेत् हस्ताभिघाताद्वा बलेन चर्मोद्वर्तयति तदाऽस्य मेढ्रचर्मावपाट्यते । इयमेवावपाटिका** ( सुनि., १३.५०–५२ )
जेव्हां पुरुष संकुचित योनिद्वार असलेल्या स्त्रीशी आनंदाने वा बलात्काराने समागम करतो, किंवा लिंगावरील त्वचा हाताने मुद्दाम चुरगळतो तेव्हां इंद्रियाची त्वचा फाटते, तो हा विकार. पुरुषाच्या जननेंद्रियाचा आघातजन्य विकार.

**अवपाटित**–वि., **एकदेशोत्पाटितम्** ( चनि. १.२१ )
एकादा भाग सोलल्यासारखी, उपटल्यासारखी ( वेदना )

**अवपीड**–पु., **उपक्रम०** ( चसू. २४.४६ )

अवपीड्य दीयत इति ( सुउ. २३.४ )
नासया प्रणीयमानः कल्कोऽवपीडसंज्ञः (असंसू. २९)
स द्विविधः—शोधनस्तम्भनश्च 'स्यादवपीडो द्विधा मतः' शिरोविरेचनार्थं शोधनप्रकारः
( चसि. ९.९० )
घ्राणप्रवृत्ते रुधिरे स्तम्भनः ( चचि. ४.९७ )
उन्मादे उपक्रम० ( चनि.७.८ )
कृमिदन्तरोगे हितकरः श्लेष्माभिष्यन्देऽपि उपयुक्तः
( सुउ. ११.३ )

संज्ञाप्रबोधनार्थं विविधरोगेषूपयोगः—
" विषाभिघातसंन्याससमूर्च्छामोहापतन्त्रके ।
मदापस्मारकामार्तिचिन्ताक्रोधभयादिषु ॥
मानसेषु च रोगेषु मूढव्याकुलचेतसाम् ।
संज्ञाप्रबोधहेत्वर्थमवपीडं प्रयोजयेत् " ॥
( सुचि. (ड. विदेह. ) ४०.४४, ४५ )
अपतानकविकारे सद्यःसंज्ञाप्रबोधनार्थं तीक्ष्णोऽवपीडः ( नस्यं ) दीयते ( सुचि. ५.५.१८ )
स च तीक्ष्णैः शुण्ठ्यादिभिः कल्कक्वाथरसादिभिः कृतोऽवतिष्ठते यस्याष्टौ बिन्दव उत्तमा मात्रा, षण्मध्यमा, चत्वारः कनिष्ठा ( अहसू. २०.७ )
एक उपचार. नाक या अवयवाला दाबून दिला जाणारा उपचार, नाकात घालावयाची औषधी चटणी. प्रकार २. १ डोक्याचे शोधन करणारा व त्यातील दोषांचे व धातूंचे स्तंभन करणारा. विशुद्ध रक्त नाकातून जात असेल तर स्तंभक व शिरोविरेचनाकरता शोधन प्रकार उपयुक्त. उन्माद, किडके दात, कफाने डोळे येणे, संज्ञानाश—बेशुद्धी यांवर तसेच विष, आघात, मूर्च्छा, संन्यास, विचार नीट करता न येणे, आचके, मद, अपस्मार, कामातुरता, चिंता, राग, भय, इत्यादी मानसरोग मन व्याकुळ असणे यांवर उपयुक्त. मधून मधून आचके येणे यात बेशुद्धि असताना तीक्ष्ण औषध नाकात घालावे. सुंठ इत्यादींची चटणी काढा रस इत्यादी आठ थेंब उत्तम, सहा मध्यम, चार थेंब हे कनिष्ठ प्रमाण होय.

**अवपीडक**—न., स्नेहयोजना ( चसू. ७.७ )
तस्य योजनाद्वयं यथा—'मूत्रजेषु तु पाने च प्राग्भक्तं शस्यते घृतम् । जीर्णान्तिकं चोत्तमया मात्रया योजनाद्वयम्' । ( अहसू. ४.६, ७ )
या पद्धतीत जेवणाचे पूर्वी व जेवण जिरल्यानंतर असे २ वेळा उत्तम म्हणजे पूर्ण मात्रेनें औषधि तूप तेल इ० देणे. मूत्रविकारात या पद्धतीने स्नेह देतात.

**अवबद्ध**—वि., विशेषेणाऽसक्तम् ( सुसू. २७.३ )
शल्यप्रकारः शरिरात खोल रुतलेले—पक्के रुतलेले शल्य.

**अवबद्धदोष**—वि., अतिबद्धदोषम् ( ८.१२७ )
अति स्थिर झालेले दोष.

**अव ( प ) बाहुक**—पु., वातरोग, सम्प्राप्तिर्लक्षणं च—अंसदेशस्थितो वायुरंसबन्धनं सिराश्चाकुञ्च्यावबाहुकं जनयेत् ( सुनि. १.८२ )
अस्यैकः प्रकारः कफवातनिमित्तजः ( मधुकोशः )
अन्यो धातुक्षयनिमित्तजवातकोपजनितः
( सुचि. ५.२३ )
चिकित्सासूत्रम्—धातुक्षयनिमित्तजे सिराव्यधो निषिद्धः ( सुचि. ५.२३ )
अत्र बृंहणं नस्यं हितम् ( अहसू. २०.४ )
खांद्याच्या ठिकाणचा वायु तेथली बंधने व शिरा आकुंचित करून अवबाहुक करतो. प्रकार २. कफवातज व धातुक्षयज. वाताने बाहूंची हालचाल होणे त्रासदायक होते. हात आखडतो तो विकार.
**उपचार**—धातुक्षयात रक्त काढणे निषिद्ध. येथे पौष्टिक तेल इ० नाकात घालणे हिताचे.

**अवभञ्जन**—न., वेदना० संचूर्णनवद् वेदना
( सुसू. २२.११ )
अवयवांचा चुरा होत आहे अशा वेदना.

**अवभासिनी**—स्त्री., शरीर० सप्तत्वक्षु प्रथमा, सर्ववर्णान् अवभासयति, पञ्चविधां छायां च प्रकाशयति व्रीहेरष्टादशभागप्रमाणा सिध्मपद्मकण्टकाधिष्ठाना
( सुशा. ४.४ )
चरके 'उदकधरा' अष्टांगसंग्रहे 'भासिनी' नाम्ना निर्दिष्टा ( चशा. ७.४ ) ( असंशा. ५ )
सात त्वचांपैकी पहिली त्वचा, सर्व वर्ण प्रकट करते. पाच प्रकारच्या छाया दाखविते तांदळाच्या १८ व्या भागाइतकी, शिबे, पद्मकंटक इ० ची अधिष्ठान. उदकधरा, भासिनीही हिला म्हणतात.

**अवमन्थ-क**—पु., शूकदोषनिमित्तरोग० ( सुनि. १४.८ )
ग्रथितशोफवान् गुह्यस्थानगतः कफवातासृग्भिर्जायते
( सुनि. १४.८ )
संप्राप्तिर्लक्षणं च—गुह्यस्थाने बहवो दीर्घा मध्यतो दीर्यमाणा वेदनारोमहर्षवत्यः पिटिका भवन्ति
( असंउ. ३८ )
'अधिमन्थ' इति माधवे, भेद्यरोगोऽयम्
( सुसू. २५.६ )
पुरुष जननेंद्रियाचा एक विकार, इंद्रिय जाड व मोठे करण्याकरितां करावयाचे उपचार चुकीने केल्याने

होणारा विकार; कफ, वात, व रक्त दुष्टीने हा होतो. इंद्रियावर गाठाळ सूज, मोठ्या, लांब, पुष्कळ पुळ्या होतात. त्या मधून फाटतात. वेदना व रोमांच त्यात असतात. अधिमंथही याला म्हणतात. हा शस्त्राने फोडण्याचा रोग आहे.

**कर्णव्यधे उपद्रव०, कर्णपाल्या असम्यग्व्यधेन जायमान उपद्रवः, कण्डूकरोऽयम्** ( सुसू. १६.२६ (८) कान टोचण्यात चूक झाली तर होणारा उपद्रव. हा खाज करतो.

**अवमन्थन**–न., ( परिव० ) **रक्तस्रावणोपक्रम०, उत्कृत्य चालनम्, आरया चर्मकारशस्त्रेणात्रमध्य रक्तं स्राव-येदित्यर्थः** ( सुचि. ३.२३ ) शिरेतून रक्तस्राव करीत असता, तो योग्य होत नसेल तर आरीने शीर उकरून व उचकटून व्यवस्थित रक्तस्राव करणे.

**अवमर्शन**–न., **घर्षणम्; स्पर्शनम्** ( सुक. ८.३९ ) घासणे, स्पर्श करणे.

**अवमानित**–वि., **उपेक्षितम्** ( सुशा.२.५१ ) उपेक्षा केलेले.

**अवमार्जन**–न., **मार्जनम्, यथा विषस्य प्रतिलोमेन मार्जनं मन्त्रैरेव कार्यमिति** ( चचि. ३३.६१ ) विष ज्या दिशेने शरिरांत जाते–चढते त्याच्या उलट दिशेने ( मंत्र म्हणून ) हाताने चोळून उतरविणे.

**अवमूत्रित**–न., **मूत्रविषैर्जन्तुभिर्मूत्रितम्** ( चसू. २६.४३ (२) विषारी मूत्र असलेल्या प्राण्याच्या मूत्राची बाधा झालेला.

**अवम्य**–वि., **वमनायोग्यः** ( चसि. २,८ ) वमन–वांती करण्याला अयोग्य, वांतीचे औषध देण्याला अयोग्य रोगी.

**अवयव**–पु., **शरीरस्य अङ्गम्** ( सुसू. १४.३ ) **तदवयवाः प्रत्यङ्गानीति** ( सुसू. ३५.१२ ) ( चवि. ८.११७; चसू. २७.३३४ ) शरिराच्या डोके इत्यादी मुख्य भागांना अवयवांना अंग व त्यांच्या भागांना म्हणजे शरिराच्या उप-भागांना उपअवयवांना प्रत्यंग म्हणतात.

**परमाणुरूपाऽवयवांशाः** ( चशा. ७.१७ ) परमाणुरूप शारीर अंश.

**घटकात्मकद्रव्यम्।** ( चवि. १.१० ) शरीराचे घटक सूक्ष्म द्रव्य.

**–प्रभाव**–पु., **अवयवात्मकद्रव्यस्य गुणविशेषः** ( चवि. १.१० ) द्रव्याच्या अवयवांचा विशेष गुण.

**–सदन**–न., **रोगलक्षण० गात्रसादः** ( असंसू. २० ) अवयव गळल्यासारखे वाटणे.

**–समुत्थ**–वि., **एकदेशोत्थितः** ( सुचि., २३.३ ) शरिराच्या एका विभागात उत्पन्न झालेला.

**अवयवावसाद**–पु., **रोगलक्षण० अवयवस्य स्वकर्मण्य-सामर्थ्यम्** ( सुसू. २५.३६–३७ ) अवयवाला स्वतःचे कर्म करण्यामध्ये सामर्थ्य नसणे.

**अवर**–वि., **कनिष्ठम्** ( चसि., १.१२ ) लहान, धाकटा. **निकृष्टम्** ( असंसू. १० ) वाईट दर्जाचे, खालच्या प्रतीचे.

**–काल**–पु., **हीनकालः अयोगकालः** ( चचि. १९.५ ) रूक्षादि द्रव्यांच्या सेवनाला ऋतूंपैकी ग्रीष्म, वर्षा हे अवर काल. अयोग्य काल.

**–सत्त्व**–वि., **हीनसत्त्व** ( चवि. ८.११९. ) अवल मनाचा. सत्वहीन.

**अवरान्न**–न., **वैदलाऽन्नं माषादि** ( सुसू. ४६.४९ ) द्विदल–उडीद इत्यादि धान्ये.

**अवरुद्ध**–वि., **संग्रहीतम्** ( सुसू. २२.८ ) संग्रह केलेले.

**अवरोध**–पु., **संग्रहः** ( सुसू. २४.४ ) **समावेशः** ( सुसू. ४.६ ) **अन्तर्भावः, संकलनम्** ( चचि. १३.३८ ) जमा करणे, गोळा करणे, एकत्र करणे. समाविष्ट करणे, मिळविणे.

**स्कन्धदेशः** ( सुसू. २९.१० ) खांदा.

**–रत**–वि.,**परिजनावृतः अन्तःपुरस्थो वा** ( सुशा. १०.५० ) परिवारात असलेला, माजघरात असलेला, स्त्रियांच्या जागेत असलेला.

**अवरोधन**–न., **निग्रहः, नियमनम्** ( चनि. ७.८ ) अडथळा, आवरणे, ताब्यात ठेवणे. निरोध. अडवणे.

**अवरोहिन्**–पु., **वनस्पति० वटः** ( रा. ११.११३ ) वड.

**अवलम्बक**–पु., **कफदोष०, अवलम्बनादवलम्बकः कफः** ( असंसू २० ) अवलंबक नांवाचा कफ. याचे उर हे स्थान. उरः-स्थानात आश्रय करणारा. ज्याच्यावर उर अवलंबून आहे तो ( कफ )

**अवलम्बन**–न., **अवलम्बककफस्य स्थैर्यबलदानधारणादि कर्म** ( अहसू. १२.१६ ) स्थिरत्व निर्माण करणे, बल देणे, धारणादि कार्ये अवलंबक कफाची होत.

**अवलम्बिन्**–वि., **लम्बनशीलः** ( सुनि. १६.६२ ) लोंबणारा.

**अवलिका**–स्त्री., वनस्पति०, धान्यकम् ( रा. ६.९७ )
धणे.

**अवलेखन**–न., शस्त्रकर्म० घर्षणेनोन्नतभागस्य निम्नता-करणम् ( सुचि.९.१० )
वाढलेला भाग खरडून काढून सपाट करणे, सारखा करणे.
कङ्कतिकादिना केशप्रसाधनम् ( सुक. १.२५ )
फणी, कंगवा यांनी केस विंचरून व्यवस्थित करणे.

**अवलेपन**–न., लेपनम् ( सुचि. ४.३० ) लेप करणे.

**अवलेहिका**–स्त्री., लेह्यमौषधम् ( सुसू. ४६.४१२ )
चाटण्याचे औषध.

**अवल्गुज**–पु., वनस्पति०, बाकुची ( चसू. २७.३३ ) ( ध. १.१६५ ) बावची.
( अवल्गुजा ) स्त्री., अवल्गुजः ( चसू. २७.३३ ) ( ध. १. १६५ ) न., बावची.

–**फल**–न., बाकुचीबीजम्, एतत्कफवातप्रणुत् (सुसू. ४२.११) ( असंसू. १२.९१ ) बावचीचे बी. हे कफवातनाशक आहे.

–**रसायन**–न., बाकुचीरसायनम् ( सुचि. २८.३ )
रसायन विधीने बावचीचे सेवन.

**अवशातन**–न., मांसस्य शटितत्वाद्गलनम् (सुक. ४.३७)
मांसाचे निर्जीव अंश गळणे, गळून पडणे.

**अवश्यकार्य**–वि., अवश्यं करणीयम् ( मूत्रोत्सर्गादिकम् ) ( अहृसू. ३.९ ) अगदी जरूरीचे कर्म, जे केलेच पाहिजे ते कर्म ( लघ्वी, शौच इ० )

**अवश्यंभाविन्**–वि., यन्निश्चयेन भवति ( असंनि. १.४ )
जे निश्चित होते ते. निश्चित होणारे.

**अवश्याय**–पु., हिमम् ( चसि. ९.७४ ) मेघं विना सूक्ष्मजलनिपातः ( सुउ. ६४.११ ) बर्फ, दंव. मेघा-वाचून पडणारे तुषार स्वरूपाचे पाणी. ( हिवाळ्यात )

**अवष्टब्ध**–वि., कृतावष्टम्भः धारितः ( असंनि. ५ )
रोखून धरलेला, आवरलेला.

**अवष्टम्भ**–पु., धारणम्, देहधारणशक्तिः ( अहृसू. ११.५ ) धैर्यम् ( चशा. ५.१२ )
धरणे, देहधारणशक्ति.

–**कर**–वि., आधारदायकम्, अवलम्बनप्रदम् ( चसू. २४.७८० ) आधार देणारे, अवलंबून अस-णाऱ्याचा आधार होणारे.

**अवष्टम्भन**–वि., बलप्रदम् ( चसू. ५.१०२ ) बलदायक.

**अवसन्न**–वि., अवसादहेतोः अन्तःप्रविष्टम् (सुउ. १९.६ )
आत गेलेला ( डोळा )

–**वर्त्मन्**–वि., अवसन्नानि प्रान्तभूतानि वर्त्मानि यस्य सः ( चचि. २५.२४ )
ज्याच्या कडा खाली आहेत असा व्रण.

**अवसर्पण**–न., ह्रासः ( काशा. पृ. ४४ ) नाश.

**अवसर्पिणी**– स्त्री., अशुभः कालः, अशुभ काल. अवनतिकालः ( काशा. पृ. ४४ )
अवनतीचा अपकर्षाचा काळ.

**अवसाद**–पु., चित्तदेहयोर्ग्लानिः ( सुसू.१५.१३ )
मन व शरीर यांचा थकवा.

**अवसादक**–पु., ग्लानिः मनोऽवसादः ( चसू. १६.१४ )
अशक्तता आणणारा, मन व शरीर यांना थकवा आणणारा.

**अवसादन**–न., रोगलक्षण० अप्रवृत्तिः वैकल्यं, ग्लानिः ( सुसू. ३२.३, सुचि. ३७.९१ )
प्रवृत्ति नसणे. विकलत्व. थकवा. ग्लानी.
व्रणोपक्रमः, उन्नतव्रणस्य उत्सन्नमांसस्य वा निम्न-त्वकरणम् ( सुचि. १.८., चचि. २५.४२ )
व्रणांचे मांस किंवा इतर भाग वर उचलून आले असताना खाली करणे

–**गण**–पु., अवसादनार्थे प्रयुक्तानां द्रव्याणां वर्गः ( सुउ. १२.१५ )
अवसादन करण्याकरिता उपयुक्त द्रव्यांचा वर्ग.

**कासीसं सैन्धवं किण्वं कुरुविन्दो मनःशिला ।**
**कुक्कुटाण्डकपालानि सुमनोमुकुलानि च ।**
**फले शैरीषकारञ्जे धातुचूर्णानि यानि च ।**
**व्रणेषूत्सन्नमांसेषु प्रशस्तान्यवसादने ।**
( सुसू. ३७. ३१ )

हिराकस, सैंधव, दारूचा गाळ, कुरुंद, मनशीळ, कोंबड्याच्या अंड्याची टरफले, फुलांच्या कळ्या, सिरस व करंजाची फळे, धातूंची चूर्णे ही व्रणातील वर आलेले मांस कमी करतात.

**अवसादनी**–स्त्री., वनस्पति०, शिंशपा ( ध. ५.१२१ )
शिसव.

**अवसादिन्**–वि., भूमौ पतितं लीनं भवति ( चचि. १९.५ )
जो मळ जमिनीवर पडला की जमिनीत जिरतो तो. ( अतिसाराचा मळ )

**अवसान**–न., विनाशः ( चवि. ३.३८ ) नाश.

**अवसेक**–पु., परिषेकः ( सुउ. ४७.३६ ) सिंचन.
क्षरणम् ( सुचि. ३६.७ )
घासून अंतस्त्वचा सोलली जाणे–व्रण होणे.

**अवसेचन**–न., **विस्रावणम्** ( असंसू. ३६० )
दोष बाहेर काढणे, रक्तस्रुति.
**व्रणोपक्रमवर्गः, अवसेचनशब्दोऽत्र वमनविरेक-शोणितविस्रावणाद्यन्तर्बहिःप्रमार्जने वर्तते, न तु केवल एव विस्रावणे** ( सुसू. १७.१७ )
व्रणाचे उपचार. येथे हा अवसेचन शब्द केवळ रक्त-स्रुतिसाठी वापरला नसून वमन विरेचन रक्तस्रुति इ० अंतर्बाह्य शुद्धीकरणाच्या अर्थाने वापरला आहे.

**अवस्तीर्ण**–वि., **आच्छादितम्** ( सुउ. ५०.९ )
आच्छादिलेले.

**अवस्था**–स्त्री., **कालविभागः दशा** (चवि. ८.१३२ ) ( सुसू. ३५.३० ) ( सुउ. ४७.११ )
वयाची अवस्था बाल्य तारुण्य इ० पूर्व, मध्य व उत्तर अवस्था ( मद्याच्या परिणामाच्या. )

**अवस्थान**–न., **स्थैर्यम् स्थिरमतित्वम्** ( चवि. ४.१० ) ( परिव० ) **अन्तर्भावः** ( सुचि. २.९७. )
स्थिरत्व स्थिरबुद्धित्व. समावेश.

**अवस्थान्तरबाहुल्य**–न., **अवस्थाविशेषाणां प्राचुर्यम्** ( सुसू. २०.१० )
अनेक भिन्न भिन्न विशेष अवस्था असणे.

**अवस्थित**–वि., **अल्पस्थानाश्रितम्** ( सुचि. ४.११ )
**–सत्त्व**–वि., **स्थिरसत्त्वम्** ( चवि. ८.१२४ )
थोड्या मर्यादित स्थानात असलेला. स्थिर मनाचा.

**अवस्रंसमान**–वि., **अधःपतमानः** ( सुनि. ८.३ )
खाली पडणारा.

**अवस्रस्तत्व**– न., **स्थानादधःप्रलम्बनम्** ( सुसू. ३२.४ )
मूळ ठिकाणाहून लोंबणारे, लोंबणे.

**अवाक्पुष्पी**–स्त्री., **वनस्पति०, शतपुष्पा** ( ध. २.१ )
**मिश्रेया** ( रा. ४.५ ) बडीशेप, बाळंतशेप.
**अपामार्गः** ( चचि. ७.११४ ) आघाडा.
**अधःपुष्पी** ( चचि. २९.६२ ) गोजिव्हा.

**अवाक्शिरस्**–वि., **नतमस्तकः** ( चवि. ८.१३ )
मस्तक लवलेला.
**निम्नशिराः** ( चशा. ६.२४ ) खाली डोके केलेला.

**अवाक्शिरसीय**–पु., **अध्याय०** ( चइ. ८.१ )
मरणसूचक चिन्हे सांगितलेल्या अध्यायाचे नांव.

**अवाङ्मुख**–वि., **अधोमुखः** ( सुचि. ८.२७ ) अधोमुख.

**अवाप्ति**–( परिव० ) स्त्री., **प्राप्तिः** ( सुचि. ३४.४ ) ( चवि. ८,९० ) मिळणे.

**अवारणीय**–वि., **न विद्यते वारणं येषां तानधिकृत्य कृतः** ( सुसू. ३३.१ ) निवारण न करता येणारे असे जे जे रोग त्या सर्वांस उद्देशून केलेला. (अध्याय)

**अवार्यता**–स्त्री., **असाध्यता** ( सुसू. ३३.३ )
साध्य न होणे.

**अवार्यवीर्य**–वि., **अप्रतिहतवीर्यः** ( सुक. ५.६३ )
ज्याचे वीर्य कमी न होणारे आहे. सतत टिकणाऱ्या वीर्याचा.

**अवालुक**–पु., **वनस्पति०, पानीयालुः** ( रापरि. ७.३१ )
आळू. पाण्याचा अळू.

**अवि**–स्त्री., **पशू०, उरभ्रः मेषः अविदुग्धम्–मधुरं, स्निग्धं, गुरु पित्तकफावहं–केवलवातेषु पथ्यम्, वातकासे हितम्** (सुसू. ४५.५४–५५) **हिक्का–श्वासकर-मुष्णम्** ( चसू. २७. २२३ )
**' श्लेष्मपित्तजननानां श्रेष्ठम् '** ( चसू. २५.४० )
**' क्षीराणामहिततमम् '** ( चसू. २५.३९ )
**आविकं दधि – मधुरं मधुरपाकमत्यभिष्यंदि दोषलं कफवातप्रकोपकम् दुर्नामकोपनम्** ( सुसू. ४५.७१–७२ ) **तद्घृतम् – लघुपाकं न च पित्तलम् कफवातघ्नं योनिरोगशोषकंपेषु हितम्** ( सुसू. ४५.१०१ )
**अहृद्यानाम् अग्र्यम्** ( असंसू. १३ )
**अविमूत्रम्–तिक्तकटुकं, सक्षारमुष्णं वातघ्नं कास-श्वासप्लीहोदरशोषवर्चोग्रहेषु हितम्** ( सुसू. ४५.२२४ ) **आघ्राणेन हिक्काघ्नम्** ( सुउ. ५०.२२ ) **अविमांसम् – मधुरं शीतं गुरु बृंहणम** ( चसू. २७.६२ ) **अतिशीतं, स्निग्धं, त्रिदोषकरम-भिष्यंदि** ( अहसू. ६,६४ ) **औरभ्रं मधुरं शीतं गुरु विष्टम्भि बृंहणम् । आविकं मधुरं मांसं किंचिद्गुरु बलप्रदम् ॥** ( रा. १७.४०८ )
मेंढा. मेंढीचे **दूध** गोड, स्निग्ध, जड, उष्ण, केवळ वातावर व वाताच्या खोकल्याला हितकर, उचकी व श्वास कारक. कफ व पित्तकारक द्रव्यात श्रेष्ठ. सर्व दुधात अहितकारक. **दही**–गोड, पचनानंतर गोड, अतिशय आर्द्रताकारक व दोषोत्पादक, मूळव्याध, कफवातप्रकोपक. **तूप**–पचल्यावर हलके, कफवात-नाशक पण पित्तवर्धक नाही. योनिरोग, क्षय, कंप, यावर हितकर. हृदयाला अहितकर असणाऱ्यात श्रेष्ठ. **मूत्र**–कडु तिखट, क्षारयुक्त, उष्ण, वातनाशक, खोकला, श्वास, प्लीहा, उदर, क्षय, व मलावरोधात हितकर, हुंगल्याने उचकीनाशक. **मांस**–गोड, थंड, जड, स्निग्ध, पौष्टिक, त्रिदोषकारक, आर्द्रता आणणारे, मलावष्टम्भक, बलप्रद.

**–प्रिय**–पु., **वनस्पति०, श्यामाकः** ( रा. १६.१४० )
सांवा, वन्यांचे तांदूळ.

**–प्रिया**–स्त्री., **वनस्पति०, श्वेता** ( रा. ५.४६ )
सुरीसारख्या पानांची पांढरी वनस्पति.

**अविकल्पक**–वि., **न शरीरस्य कृत्रिमतापादिगुणेन भेदकः तथौषधस्य च न प्रमाणोत्कर्षापकर्षभेदकारकः** ( चवि. ८.१२८ )
जो शरिराचा कृत्रिमतापादि गुणांनी विभाग करीत नाहीं. तसेच औषधाचा प्रमाणाच्या कमीजास्तपणाने भेद करीत नाही असा.

**अविकारिन्**–वि., **गुणव्यापत्तौ अपि अल्पविकारं निर्विकारं वा** ( सुसू. ३४.२३ )
मूळचा गुण बिघडला तरी विकार न करणारे, किंवा अल्पविकारकर.

**अविक्लवकर**–वि., **अग्लानिकरम्, अहर्षकरं च** ( सुसू. ३५.३७ )
थकवा न निर्माण करणारे, उत्साह न उत्पन्न करणारे.

**अविक्लिप्ति**– स्त्री., **केवलप्रयोगः** ( चवि. ८.१३६ )
केवळ एका द्रव्याचा उपयोग, असंयुक्त द्रव्याचा म्हणजे एकाकी द्रव्याचा प्रयोग.

**अविघात**–पु., **विघातकराभिघातादिविरहः** ( चशा, ६.१२ )
नाश करणाऱ्या अभिघातादिकांचा अभाव.

**अविचेष्टन**–न., **लक्षण०, निष्क्रियत्वम्** ( चचि. १८.१७)
निष्क्रियत्व, चेष्टानाश.

**अविदग्ध**–वि., **असंयुक्त** ( सुउ. ६३.४ )
संयोग न झालेले, एकाकी.

**अविधेय**–वि., **आज्ञापितोऽपि यः यथानिर्देशं कर्म न करोति** ( चसि. २.६ असंसू. २.२० )
आज्ञा केल्यावरही त्याप्रमाणे जो काम करीत नाही तो. आज्ञेची अवज्ञा करणारा.

**अविपाक**–पु., **लक्षण०, अजीर्णम्** ( चसू. १६.१३ )
अजीर्ण. अपचन,

**अविपाकता**–स्त्री., **लक्षण०, अजीर्णावस्था** ( सुसू. ४५.१५ ) अपचनावस्था.

**अविभाग**–पु., **अपृथक्त्वम्** ( सुशा. ९.३ )
विभाग नसणे. अभेदत्व. अभिन्नत्व.

**अविभ्रम**–वि., **अग्लानिकरः** ( चवि. ८.९४ )
थकवा न आणणारे.

**अविमुक्त**–पु., **वनस्पति०, अतिमुक्तकः** ( ध. ५.१५३ )
सुगंधी फुलांची वनस्पति. कस्तुर मोगरा, लिवस, टेंभुरणी, कुसरी.

**अविवर्ण**–वि., **ईषद्विविधवर्णम्**
अनेक वर्णाच्या थोड्या थोड्या छटा असलेले.
**यत् वस्त्रादिलग्नं सत् प्रक्षाल्यमानमपि न विवर्णतां याति तत्** ( सुसू. १४.२२ ) वस्त्राला लागलेला रंग ते वस्त्र धुतल्यावरही जात नाही ते.
**ईषद्विवर्णः** ( सुनि. ११.६ )
त्वचेच्या वर्णापेक्षा थोडा भिन्न वर्ण.
**अविशिष्टवर्णम्** (सुउ. २२.१६) निरनिराळ्या वर्णांचे.

**अविशारद**–पु., **अदृष्टसभः** ( चवि. ८.२१ )
ज्याने सभा कधी पाहिली नाही असा.

**अविशुद्ध**–वि., **वमनविरेचनाभ्यामविशुद्धदेहः** ( सुचि. ३७.९३ )
वमनविरेचनांनी ज्याचे शरीर शुद्ध झालेले नाही असा. वमनविरेचन न घेतलेला.

**अविशेष**–पु., **ज्ञाज्ञयोः प्रकृतिविकारयोः प्रवृत्तिनिवृत्त्योश्च सामान्यदर्शनम्** ( चशा. ५.१० )
ज्ञानी अज्ञानी, प्रकृति विकृति, प्रवृत्ति निवृत्ति, यात कांही फरक न दिसणे.

**–ग्राहिन्**–वि., **ज्ञाज्ञद्वन्द्वेषु सामान्यदर्शी** ( चशा. ५.१० ) ज्ञानी व अज्ञानी अशा जोड्यांना सारखेच लेखणारा–समजणारा.

**अविशोषित**–वि., **अलंघितम्, असम्यग् लंघितम्** ( का. विशेषकल्प० पृ. २१९ )
लंघन न केलेला, चांगले लंघन न झालेला.

**अविषादकर**–वि., **शरीरमनसोरग्लानिकरम्** ( चवि. ८.९४ )
शरीर आणि मन यांना थकवा न आणणारे.

**अविसरण**–न., **अप्रसरणम्** ( सुनि. १०.१६ )
प्रसरण न पावणे, न पसरणे.

**अविसर्गिन्**–वि., **अविसर्जनशीलः** ( सुउ. ३९.६९ )
टिकाऊ, सतत राहाणारा.

**अवीनस**–पु., **नासागतरोग०, तस्य लक्षणानि–सघुर्घुरश्वासः, पीनसाधिकवेदना, अवेरिव नासिका प्रक्लिन्ना सती अविच्छिन्नं पिच्छिलं शीतं पक्वं घनं सिंघाणकं स्रवति, अष्टांगहृदयेऽयं रोगः 'अपीनस' नाम्ना निर्दिष्टः** ( असंउ. २३ )
नाकाच्या रोगाचे नाव. लक्षणे–घुर्घुर आवाज करीत श्वास, पडशाच्या अधिक वेदना, मेंढ्याप्रमाणे नाक ओले व सतत बुळबुळीत, पिकलेला, दाट शेंबूड गळतो. अपीनस असेही याला म्हणतात.

**अवृत्ति**–वि., **न विद्यते वृत्तिर्जीविका यस्य** ( अहृसू. २.२२ ) ज्याला उपजीविकेचे साधन नाही असा. निर्वाहाचे साधन नसलेला.

**अवेक्षण**–न., **अवेक्षा, परीक्षणम्** ( चचि. ३०.२९६ ) परीक्षा करणे.

**अवेक्ष्यावेक्ष्यकारिन्**–वि., **समीक्ष्यकारी** ( चवि. ८.१३) सर्व बाजूंनी विचार करणारा.

**अव्यक्त**–वि., **न व्यक्तम्, अदृश्यमूर्तिकम्, सूक्ष्मम्** ( सुनि. १.७ ) व्यक्त नसलेले. ज्याचा स्पष्ट आकार दिसत नाही; सूक्ष्म. डोळ्याला न दिसणारे.

न., **प्रकृतिः मूलप्रकृतिः सांख्ये** ( सुशा. १.३ ) प्रकृति व पुरुष यांपैकी प्रकृति. सांख्यशास्त्रातील मूळ प्रकृति.

**–विग्रह**–वि., **विद्यमानाविद्यमानांगप्रत्यंगः** सूक्ष्म अंगप्रत्यंगांपैकी काही आहेत, काही नाहीत असा पहिल्या महिन्याचा गर्भ.

**अंगानां च बीजरूपतया स्थितत्वेन सत्त्वम् अव्यक्तभावाच्चासत्त्वम्** ( चशा. ४.९ ) बीज रूपाने अस्तित्व पण अव्यक्त असल्याने अस्तित्व नाही असे दिसते. बीजरूपाने अंगावयव आहेत म्हणून ज्याला गर्भ आहे म्हणावे पण ते सर्व अव्यक्त असल्याने तसे म्हणताही येत नाही असा.

**अव्यथा**–स्त्री., **वनस्पति॰ कदली, गुडूची, हरीतकी वा** (चसू. ४.१८ ( चक्र॰) केळ, गुळवेल, किंवा हिरडा.

**अव्यध्य**–वि., **वेधनायोग्या** ( सुशा. ७.२२) वेध करण्याला योग्य नसलेली ( शीर )

**अव्यय**–वि., **निर्विकारः** ( सुशा. ३.४ ) विकार नसलेला, नाश नसलेला.

पु., **आत्मा** ( चशा. ४.८ ) आत्मा.

**अव्यवसाय**–पु., **अनिश्चयः, संशयः** ( चसू. २५.४० ) निश्चय नसणे, संशय.

**अव्यवस्था**–स्त्री., **अनियमः** ( असंनि. २.२२ ) नियम नसणे.

**अव्यवस्थितमति**–वि., **अनवस्थितबुद्धिनिश्चयः** ( सुशा., ४.६६ ) ज्याला निश्चित एक निर्णय घेता येत नाही असा. अस्थिर बुद्धीचा.

**अव्यापक**–वि., **अव्याप्तिदोषग्रस्तम्** ( चवि. ८.६७ ) अव्याप्तिदोषाने युक्त.

**अव्यापत्ति**–स्त्री., **रोगराहित्यम्, आरोग्यम्** ( चवि. ८.८९ ) रोगाभाव, रोग नसणे. आरोग्य.

**अव्यापन्न**–वि., **प्रकृतिस्थम्, अविकृतम्** ( सुसू. २१.३ ) न बिघडलेले, अविकृत, निर्दोष.

**–ऋतुकृत**–वि., **कालस्वभावकृतः, पित्तादिचयकृतः** ( सुसू. २४.७ ) कालाच्या स्वभावाने निर्माण झालेले जसे रोग. वसंतात कफ प्रकोप होऊन रोग होणे हा काळाचा स्वभाव आहे. पित्तादिकांच्या चय प्रकोपांनी केलेले रोग.

**अव्याहत-गति**–वि., **अपरित्यक्तस्वमार्गः, अनवरुद्धमार्गः** ( चचि. २८.४ ) ज्याच्या गतीला अडथळा नाही असा, स्वतःचा मार्ग न सोडलेला. ज्याच्या मार्गात अडथळा नाही असा.

**अशक्य**–वि., **असाध्यम्** ( चचि. १७.१४९) साध्य न होणारे.

**–प्रातिलोम्यत्व**–न., **यस्य प्रातिलोम्यं नाम अनुलोम, वैपरीत्येन नयनम् अशक्यं, तत् अशक्यप्रातिलोम्यं, तस्य भावः, यथा उभयमार्गगे रक्तपित्ते वमनम् अपथ्यम् ऊर्ध्वप्रवृत्तत्वात्, विरेचनमपथ्यम् अधः-प्रवृत्तत्वात्** ( असंनि. ३ ) रक्तपित्तात प्रतिलोम म्हणजे उलट मार्गाने दोषहरण करणे आवश्यक आहे. अधोग रक्तपित्ताला वांतीचे औषध व ऊर्ध्वग रक्तपित्ताला रेचक योग्य आहे. पण अधोग व ऊर्ध्वग अशा उभयमार्गी रक्तपित्ताला वमन देणे अपथ्य आहे कारण ते ऊर्ध्व मार्गाने जाणार व विरेचन अधोमार्ग प्रवृत्तीमुळे अपथ्य अशा स्थितीला अशक्यप्रातिलोम्यत्व असे म्हणतात.

**अशन**–पु., **वनस्पति॰, बीजकः** ( सुउ. ४५. ३४ ) डाळिंब.

न., **भोजनम्, अन्नम्** ( सुचि. ३७.५५ ) **अयुक्ताशनप्रकाराः—समशनं, विषमाशनम्, अध्यशनं, विरुद्धाशनं विरुद्धवीर्याशनं वा, अमात्राशनं, अजीर्णाशनम्, अल्पशनं, प्रमिताशनं, प्रसृताशनम्, अतिरूक्षाशनमित्येवमादयः। एते प्रकारा आमयोत्पत्तौ मूलहेतुभूताः सन्ति, केचित्तु घोरव्याधिजनका मृत्युकारका वा भवन्ति** ( चचि. १५.२३५; चसू. २५.४०; चसू. २६.१०३; सुसू. ४६.५०८; सुसू. २०.१९; काखि. ५.६०–६२ ) **अपथ्यकराणामेतेषामशनानां विवरणं तत्तत्स्थाने द्रष्टव्यम्।** जेवण, अन्न. अयोग्य जेवणाचे प्रकार–पथ्यापथ्य एकत्र खाणे, अकाली पुष्कळ किंवा थोडे खाणे, जेवल्यावर जेवणे, विरुद्ध रसाचे, विरुद्ध वीर्याचे, शरीराला आवश्यक असलेल्या प्रमाणापेक्षा कमी

जास्त खाणे, अजीर्णावर खाणे, अति खाणे, अगदी मोजके खाणे, वेळ टळल्यावर किंवा अगदी थोडे खाणे, भूक तहान शमल्यावर खाणे, अतिशय रूक्ष खाणे, ही रोगाची मूळ कारणे होत. हे प्रकार घोर रोगकारक किंवा मृत्युकारक होतात.

**–प्रविचार**–पु., **स्वस्थावस्थानां वयःप्रकृतिसात्म्यासात्म्यरोगादीनवेक्ष्य कृताः शीतोष्णस्निग्धरूक्षद्रवशुष्कैककालिका द्विकालिकौषधयुक्तमात्राहीनदोषप्रशमनवृत्त्यर्था द्वादशविधा अशन–प्रविभागाः** ( सुउ. ६४.५६ )
भोजनाचा युक्तायुक्त विचार करण्याचे बारा प्रकारचे मुद्दे आहेत. ते अशनप्रविचार होत. स्वस्थ व रोगी यांचे वय, प्रकृति, सात्म्य, असात्म्य; रोग इत्यादीना पाहून केलेले थंड उष्ण; स्निग्ध रूक्ष; पातळ सुकलेले; एका वेळी दोन्ही वेळी; औषध युक्त, कमी प्रमाण, दोषशमन व जीवनाकरिता असे बारा विभाग होतात.

**अशनायित**–वि., **बुभुक्षितः** ( सुचि. २९.१२ ) भुकेलेला.

**अशनि**–पु., **मुशलवदधःपतनशीलो मारणात्मकः पदार्थविशेषः** ( सुसू. २४.७ )
आकाशातून पडणारा एक प्रकारचा मारक पदार्थ.
**वज्रम्** ( सुक. ४.३६ ) वज्र नावाचे हत्यार.
**खनिजद्रव्य०, हीरकम्** ( ध. ६.५५ ) हिरा.

**अशब्द**–पु., **शब्दाभावः** ( चइ. ४.१९ )
शब्दाचा अभाव.

**–श्रवण**–न., **लक्षण० शब्दाभावेऽपि शब्दश्रवणम्** ( चचि. ८.६ ) शब्दांचा अभाव असूनही शब्द ऐकायला येणे. कानात आवाज होणे.
**रोग० अशीतिवातविकारेषु एकः** ( चसू. २०.११ ) ऐंशी वातविकारांपैकी एक. कानात आवाज होणे.

**–श्रुति**–स्त्री., **लक्षण० अशब्दश्रवणम्** ( असंसू. २० ) नसते शब्द ऐकायला येणे. कानात आवाज होणे.

**अशस्त**–वि., **अमंगलम् अप्रशस्तम्** ( असंसू. ३ )
मंगल नाही ते अमंगल. प्रशस्त न वाटणारे.

**–स्वप्नदर्शन**–न., **अप्रशस्तानाममङ्गलानां वा स्वप्नानां दर्शनम्** ( चसू. १६.१५ )
अमंगल किंवा वाईट स्वप्ने दिसणे.

**अशस्त्रकृत्य**–वि., **शस्त्रकर्मण्ययोग्या** ( सुशा. ७.२२ )
शस्त्रकर्म करता येण्यासारखा नाही असा रोग. शस्त्रकर्माला अयोग्य.



**अशाखा**–स्त्री., **वनस्पति०, शूली** ( रापरि. ८.६८ )
शूलासारख्या पानांची फांद्या नसलेली पाण्याच्या आश्रयाने होणारी वनस्पती.

**अशित**–न., ( चसू. २८.३ ) **चतुर्विधान्नस्यैकः प्रकारः** ( सुशा. ४.१९ ) **भक्तादि** ( सुसू. ४६.४९४ )
भात इत्यादि अन्न. चार प्रकारच्या अन्नांपैकी एक.
**भोज्यम् अद्यम् इत्यस्य पर्यायौ** ( सुसू. १४.३ )
**पेयलेह्याद्यभक्ष्याणां गुरु विद्याद्यथोत्तरम्** ( सुसू. ४६.४९४ )
पेय, लेह्य, अद्य, भक्ष्य हे प्रकार उत्तरोत्तर जड. यालाच अद्य, भोज्य म्हणतात.
**वि. कृतभोजनः** ( सुसू. ४६.४८२ )
भोजन केलेला, जेवलेला.

**–जफल**–पु., **वनस्पति०, मधुनारिकेरः** ( रा. ११.११० ) गोड नारळ, मोहाचा नारळ.

**अशिर**–न., **खनिजद्रव्य०, हीरकम्** ( ध. ६.५६ ) हिरा.

**अशुक्लचंदन**–न., **रक्तचंदनम्** ( सुउ. ५०.१७ )
रक्तचंदन.

**अशुचिदर्शन**–न., **अमेध्यवस्तुदर्शनम्, बीभत्सादिदर्शनम्** ( सुउ. ५७.६ ) ओंगळ किळसवाण्या वस्तूंचे दर्शन. घाणेरड्या वस्तूंचे दर्शन.

**अशुद्ध**–वि., **अकृतस्नेहस्वेदवमनविरेचनः** ( सुचि. ३७.४३ )
शोधन न केलेला. वमनविरेचन न केलेला.
**कलुषितम्** ( सुचि. २४.११७ ) दूषित.

**अशुभोदय**–वि., **मरणकारणम्** ( चइ. ४.६ )
मरणदर्शक लक्षण.

**अशोक**–पु., **वृक्ष० लोहितकुसुमः** ( सुसू. ३८.१४ (ड) **अयं वसंते पुष्पितो भवति** ( सुसू. ६.२७.२९ ) **अस्य त्वक्पुष्पबीजपल्लवादयो भैषज्यार्थमुपयुज्यन्ते । पुष्पमंजनार्थमुपयुज्यते** ( सुउ. १७.८ ) **बीजं कासशमनार्थमुपदिष्टम्** ( काचि. ) **वेदनास्थापनगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१८ )
अशोक. हा लाल फुलांचा वृक्ष वसंतात फुलतो. याची साल, फुले, बी, पाने इत्यादी औषधाकरिता उपयुक्त. अंजनाकरिता फूल, व खोकला आणि वेदना कमी करण्याकरिता बी उपयोगी.
**अशोकगुणाः–मधुरः** ( रा ), **तिक्तः कषायश्च** ( भाप्र. ), **शीतो, हृद्यः सन्धानीयः, कृमिहारकः** ( रा. ) **ग्राही, वर्ण्यः** ( भाप्र. ), **पित्तघ्नः, अर्शः, कृम्या-**

पचिव्रणदाहश्रमगुल्मशूलोदराध्माननाशनः ( रा. ) तृषाशोषविषास्रजित् ( भाप्र. ) ( ध.५.१५९ )
अशोकगुण—गोड, कडु, तुरट, थंड असून हृदय आणि वर्ण यांना हितकर, हाडांना जोडणारा, मळ घट्ट करणारा, पित्तनाशक, मूळव्याध, कृमि, जुन्या गंडमाळा, व्रण, दाह, श्रम, गुल्म, शूल, उदर, पोटफुगी, तहान, क्षय, विष व रक्तस्राव यांना जिंकतो.

**–रोहिणी**–स्त्री., **वनस्पति०, कटुका. संज्ञास्थापनगणे.**, ( चसू. ४.१८; चक. १.२३ ) कुटकी.
**अशोकसदृशपत्रा लता** ( चक. १.२३ )
अशोकाच्या पानासारख्या पानांची वेल.

**अशोचा**–स्त्री., **वनस्पति० व्रीहिः** ( रा. १६.१०० )
तांदूळ.

**अशौण्ड**–पु.,, **अमद्यपः, शुण्डा मद्यशाला, तत्प्रचारी शौण्डः, न शौण्डः अशौण्डः, मद्यनिवृत्तः इति** ( चवि. ८.१२ )
मद्य न पिणारा, मद्यपान सोडलेला. शुंडा म्हणजे मद्यशाळा; व तेथे जाणारा तो शौंड. तेथे न जाणारा व मद्य सोडणारा तो अशौंड.

**अश्मन्**–पु., **पाषाणः** ( असंउ. १ पृ. १ ) दगड.
**खनिजद्रव्य०, मनःशिला** ( र. ३०.५६ ) मनशीळ.
**स्वर्णमाक्षिकम्** ( र. ३०.५६ ) सुवर्णमाक्षिक.
**रोग०, अश्मरी** ( असंसू. ५.२३ ) मुतखडा.
**अनुयत्र०,** ( अहृसू. २५.३९ ) उपयंत्र, अनुयंत्र.
**सुश्रुतेऽष्ठीलाश्मनाम्ना एतदनुयत्रं पठितम्** ( सुसू. ७.१५ )
सुश्रुतात अष्ठीलाश्म नावाचे हे उपयंत्र सांगितले आहे.

**( अश्म )–कदली**–स्त्री., **वनस्पति०, काष्ठकदली** ( रा. ११.११० ) रानकेळ.

**–केतु** स्त्री., **क्षुद्रपाषाणभेदा** ( रा. ५.२१५ )
हलका पाषाणभेद.

**–गर्दभ**–पु., **रोग०, पाषाणगर्दभः** ( र. २५.२ ) एक रोग.

**–गर्भ** वि., **अश्मा गर्भेऽभ्यन्तरे यस्य तत् मणिविशेषः, मरकतम्** ( असंसू. २१.४ ) मरकत.
मणी, पाच, पाचू; ज्याच्या गर्भात अश्मा म्हणजे दगड आहे तो.

**–गर्भज** न., **मणिविशेषः** ( ध. ६.४९ ) पाचू.

**–घनस्वेद** पु., **त्रयोदशस्वेदेष्वेकः** ( चसू. १४.३९ ) **घनाश्मस्वेदः, अस्य पर्यायः** ( असंसू. २६ )
**स्वेदनविधिः–पुरुषायाममात्रमधिकं वा घनं समं च शिलातलं वातहरदारुदीप्तेनाग्निना सर्वतस्तापयित्वाऽग्निमपोह्योष्णोदकेन प्रोक्ष्य तं कौषेयाविकसंस्तरं कृत्वा तस्मिन् स्वभ्यक्तसर्वाङ्गः कौरवाजिनकौषेयप्रावाराद्यैः सुसंवृतः स्वापं कुर्यात् ।**
( चसू. १४.४७.५० )
तेरा प्रकारच्या घाम काढण्याच्या प्रकारांपैकी एक. कृति–मनुष्याच्या लांबी इतकी किंवा थोडी अधिक लांब पक्की सपाट शिळा वातनाशक औषधे जाळून सर्व बाजूने तापवावी, नंतर तो अग्नि दूर करून ऊन पाणी शिंपावे व त्यावर लोकरीचे वस्त्र किंवा मृगचर्म, कांबळे इ० पांघरून झोपावे.

**–घ्न**–पु., **वनस्पति०, पाषाणभेदः** ( ध. १.१५७ )
पाषाणभेद

**–ज**–न., **खनिजद्रव्य०, शिलाजतु** ( ध. ३.१६५ )
शिलाजित.
**मुंडलोहम्, लोह०** ( रा. १३.२९ )
लोहाचा एक प्रकार.

**–जतु**–न., **शिलाजतु** ( चचि. १६.८१ ) शिलाजित.

**–जतुक**–न., **खनिजद्रव्य०, शिलाजतु.** ( रा. १३.२२९ ) शिलाजित.

**–ज-जतु**–( परिव. ) न., **शिलाजतु** ( सुउ. ४१.५७ )
शिलाजित.

**–जित्**–**वनस्पति०, पाषाणभेदः** ( ध. १.१५७ )
पाषाणभेद.

**–भिद्**–पु., **वनस्पति०, पाषाणभेदः,** ( चचि. २६.४६ ) पाषाणभेद.

**–भेद**–पु., **वनस्पति०, पाषाणभेदः** ( सुउ. ५८.४७ )
पाषाणभेद.

**–भेदक**–पु., **वनस्पति०,** ( चसू. २३.१५ ) ( ध. १.१५७ ) पाषाणभेद.

**–मलचूडा**–स्त्री., **वनस्पति०, गुंजा** ( रा. ३.४७ )
गुंजा.

**–लाक्षा**–स्त्री., **खनिजद्रव्य०, शिलाजतु** ( रा. १३.२२९ ) शिलाजित.

**–सार**–पु., **शिलाजतु** ( सुउ. ५९.२४.२५ )
शिलाजित.
पु., न., **लौहम्** ( र. ५.१ ) लोह.

**–स्वेद**–पु., **अश्मघनस्वेद०,** ( चचि. ३.४८.४९ )
पहा. 'अश्मघनस्वेद'.

**अश्मक**–पु., जानपद०, अवन्तिजनपदस्य
**दक्षिणपश्चिमस्यां दिशि स्थितो गोदातटवर्ती जनपदः यस्य राजधानीं प्रतिष्ठानं, पौंडन्यं वा मन्यन्त ऐतिह्यविदः; तत्रस्थो जनो वा** (चचि. ३०.३१७)
एका प्रदेशाचे नाव.
अवंतीच्या दक्षिण पश्चिम दिशेला गोदेच्या तीरावर असलेला प्रदेश; पैठण याची राजधानी.

**अश्मन्त**–न., वनस्पति०, **अश्मन्तकः** (असंसू. १५)
आपटा.

**अश्मन्तक**–पु., वृक्ष० **मालुयासदृशपत्रो वृक्षः,** (चसू. १.११४)
**अम्लोटसदृशो यमलपत्रकः** (सुसू. ४६.१७०) **युग्मपत्रकः,** (सुचि. २५.१९) आपटा.
**अम्लोटकसदृशो वृक्षः, तस्य वल्कलं सीवनार्थमुपयुज्यते** (सुसू. २५.२०) **मालुकपर्णः** (असंउ. ४४) (इंदु पृ. ३६५.६६) **अश्मन्तकगुणाः–कषायो, मधुरः शीतः, संग्राही पित्तकफघ्नः रक्तदोषप्रमेहविदाहतृष्णाविषमज्वरविषच्छर्दिप्रभृतिरोगघ्नः** ( ध. १.१९४ ) **मूत्रसंग्रहणीयगणे उपदिष्टम् एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१५ ) **अश्मन्तकफलगुणाः–कषायं हिमं स्वादु वातकफजित् च** (सुसू. ४६.१७०)
मालुया, मालुक, अम्लोट, अम्लोटक या नावाच्या झाडाच्या पानांसारखा आपटा. याच्या सालीचे धागे शिवण्याकरिता उपयुक्त. गुण–तुरट, गोड, थंड, मळ बांधणारा, कफपित्तनाशक, रक्तदोष, प्रमेह, छातीतली जळजळ, तहान, थंडीताप, विष, ओकारी इत्यादीनाशक, मूत्र कमी करणाऱ्या गणात आहे. फळाचे गुण–तुरट, गोड, थंड, वातकफनाशक.
**वनस्पति०, पाषाणभेदी, पाषाणभेदः, अम्लस्कन्धे द्रव्य०** ( चवि. ८.१४० )
पाषाणभेद. आंबट वर्गातील एक.
**अम्लपत्रः** ( सुशा. १०.५९ )
आंबट पानांची वनस्पती.
**गर्भस्रावपरिहारार्थं गर्भिण्या द्वितीयमासे उपयुज्यते ।** (सुशा. १०.६२) गर्भाचा स्राव होऊ नये म्हणून. गर्भिणीला दुसऱ्या महिन्याला देतात.
**पतिष्यति गर्भे शोणितस्यादर्शने वेदनायां च सत्यामश्मन्तकशतावरीपयस्या सिद्धं पयः पाययेत** (सुशा. १०.५७)
गर्भपाताच्या वेळी रक्तस्राव नसताना व वेदना असता आपटा व शतावरीसिद्ध आणि क्षीरकाकोली सिद्ध दूध द्यावे.
**मणिविशेषः** ( सुउ. १५.२६.२८ ) मण्यांपैकी एक.

**अश्मरी**–स्त्री., रोग०, **मार्गे स्रोतसि वा विशेषतो मूत्रमार्गे संभूतः पाषाणविशेषः । हेतुः संप्राप्तिश्च सुश्रुते–तत्र असंशोधनशीलस्यापथ्यकारिणः प्रकुपितः श्लेष्मा मूत्रसंपृक्तोऽनुप्रविश्य बस्तिमश्मरीं जनयति** ( सुनि. ३.४ ) **संप्राप्तिश्च चरके–पवनो बस्तिगतं सशुक्रं मूत्रं सपित्तं कफं वा यदा विशोषयेत्तदाऽश्मरी उपजायते, यथा गोः पित्तेषु रोचना भवति** ( चचि. २६.३६ )
**अप्सु स्वच्छा ( स्था ) स्वपि यथा निषिक्तासु नवे घटे; कालान्तरेण पङ्कः स्यादश्मरी–संभवस्तथा । संहन्त्यापो यथा दिव्या मारुतोऽग्निश्च वैद्युतः । तद्वद्बलासं बस्तिस्थमूष्मा संहन्ति सानिलः** ( सुनि. ३.२४.२७ )
**अश्मरीपूर्वरूपम्–सुश्रुते–**
**ज्वरो बस्तिपीडारोचकौ मूत्रकृच्छ्रं बस्तिशिरोमुष्कशेफसां वेदना कृच्छ्रावसादो बस्तगंधत्वं मूत्रस्येति । यथास्ववेदनावर्णं दुष्टं सान्द्रमथाविलम् । पूर्वरूपेऽश्मनः कृच्छ्रान्मूत्रं सृजति मानवः ॥** ( सुनि., ३.५.६ )
**अश्मरीसामान्यलक्षणम्–सुश्रुते–**
**'अथ जातासु ( अश्मरीषु ) नाभिबस्तिसेवनीमेहनेष्वन्यतमस्मिन् महती वेदना मूत्रधारासंगः सरुधिरमूत्रता मूत्रविकिरणं गोमेदप्रकाशमत्याविलं ससिकतं विसृजति धावनलङ्घनप्लवनपृष्ठयानोष्णाध्वगमनैश्चास्य वेदना भवन्ति** ( सुनि. ३.८ )
**अश्मरीसंख्या–चतस्रोऽश्मर्यो भवन्ति श्लेष्माधिष्ठानाः तद्यथा–श्लेष्मणा, वातेन, पित्तेन, शुक्रेण च.** ( सुनि., ३.३ )
**वाताश्मरीलक्षणम्–तस्य ( वाताश्मरीपीडितस्य ) मूत्रप्रतिघातात्तीव्रवेदना भवति, तदाऽत्यर्थं पीड्यमानो दन्तान् खादति, नाभिं पीडयति मेढ्रं प्रमृद्नाति, पायुं स्पृशति, विशर्धते, विदहति-वातमूत्रपुरीषाणि कृच्छ्रेणास्य च मेहतो निःसरन्ति, वातिका–अश्मरीरूपम्–**
**अश्मरी चात्र श्यावा परुषा विषमा खरा कदम्बपुष्पवत्कण्टकाचिता भवति, तां**

**वातिकीमिति विद्यात्** ( सुनि. ३.१० )
**अश्मरी ( पित्तजा )–**
**तस्य मूत्रप्रतिघाताद् ऊष्यते चूष्यते दह्यते पच्यत इव बस्तिरुष्णवातश्च भवति। अश्मरी चात्र सरक्तपीतावभासा कृष्णा भल्लातकास्थि-प्रतिमा मधुवर्णा वा भवति** ( सुनि. ३.९ )
**अश्मरी ( कफजा )–**
**तस्य मूत्रप्रतिघाताद्दाल्यते भिद्यते निस्तुद्यत इव च बस्तिः गुरुः शीतश्च भवति। अश्मरी चात्र श्वेता स्निग्धा महती कुक्कुटाण्डप्रतीकाशा मधूकपुष्पवर्णा वा भवति** ( सुनि. ३.८ )
**शुक्राश्मरीलक्षणम्–**
**'सा मूत्रमार्गमावृणोति मूत्रकृच्छ्रं बस्तिवेदनां वृषणयोश्च श्वयथुमापादयति, पीडितमात्रे च तस्मिन्नेव प्रदेशे प्रविलयमापद्यते।** ( सुनि. ३.१२ )
**शर्करा सिकतामेहो भस्माख्यश्चेत्यश्मरीविकाराः** ( सुनि. ३.१३ )
**मूत्रमार्गगताया अश्मर्या लक्षणम्–**
**दौर्बल्यं सदनं कार्श्यं कुक्षिशूलमरोचकः। पाण्डुत्वमुष्णवातश्च तृष्णा हृत्पीडनं वमिश्चेति।** ( सुनि. ३.१७ ) **प्रायेण वातजादयस्तिस्रोऽश्मर्यो बालानां जायन्ते।** ( सुनि. ३. ११ )
खडा. मूतखडा. मार्गात स्रोतसात विशेषतः मूत्रमार्गात झालेला खडा. **हेतु व संप्राप्ति**–शरीर शुद्ध न करण्याच्या प्रवृत्तीच्या माणसाला अपथ्य करण्याने दुष्ट कफ मूत्रात दुष्टि करून बस्तीमध्ये खडा करतो. वात बस्तीतील शुक्रासह मूत्र किंवा पित्तासह कफ शोषतो, तेव्हां गाईच्या पित्तात जसे रोचन होते तसा खडा होतो. स्वच्छ पाण्यात टाकून ठेवलेल्या कोऱ्या घड्यात जसा काही काळाने चिखल होतो तसे किंवा आकाशातील पाण्याला वायु, विद्युत व अग्नि घट्ट करितात त्या प्रमाणे बस्तीतील कफाला ऊष्मा घट्ट करतो; म्हणजेच खडा–मूतखडा करतो. **पूर्वरूपे**–कष्टाने लघ्वी, बस्तीत वेदना, बस्तीचा वरचा भाग, वृषण, लिंग, यात कष्टयुक्त वेदना, अंगग्लानि, लघ्वीला बोकडासारखी घाण, ज्वर, अरुचि, दोषांना अनुसरून वेदनायुक्त आणि दोषानुरूप रंगाचे दाट व गढूळ मूत्र होते.
**सामान्य लक्षणे**–नाभि, बस्ति शिवण, लिंग यां पैकी कशातही मोठ्या वेदना, मूत्रधारा अडकणे, लघ्वीत रक्त, मूत्र सरळ न पडता इकडे तिकडे पडणे, गोमेद मण्यासारखे, अतिशय गढूळ, वाळूच्या कणांनी युक्त मूत्र होते. धावणे, पोहणे, उल्लंघन, वाहनाच्या पाठीवर बसणे, घाम येणे, मार्गक्रमण यांनी वेदना वाढतात **संख्या**–चार. या सर्व अश्मरी कफाच्या आधाराने होतात, कफ पित्त वात व शुक्र यांनी होतात. **वाताश्मरी** लक्षणे–मूत्र अडून तीव्र वेदना होतात, रोगी दांत खातो, बेंबी दाबतो, लिंग चुरगळतो, गुदाला स्पर्श करतो त्याचा अधोवायु आवाजयुक्त सरतो, लघ्वी करतांना लघ्वी, वात, मळ कष्टाने बाहेर येतात. लिंगात जळजळते. अश्मरीचे **स्वरूप**–कळंबाच्या फुलासारखा, कांटेयुक्त, काळा, खरखरीत, विषम व रूक्ष असा खडा असतो. **पित्तज**–मूत्र अडल्यावर गरम होते, चोखल्याप्रमाणे, जाळल्याप्रमाणे, शिजल्याप्रमाणे बस्ति वाटतो, उष्णवात होतो. **स्वरूप**–लालसर, पिवळट, काळी किंवा मधासारखी बिब्ब्याच्या बीसारखी अश्मरी ( खडा ) असते.
**कफज**–मूत्र अडल्यानंतर बस्तीमध्ये फाडल्याप्रमाणे, फोडल्याप्रमाणे, टोचल्याप्रमाणे वेदना होतात. बस्ति जड व थंड असतो. **स्वरूप**–खडा पांढरा, स्निग्ध, मोठा, कोंबड्याच्या अंड्यासारखा किंवा मोहाच्या फुलाच्या रंगाचा असतो. **शुक्राचा खडा**–हा मूत्रमार्ग अडवतो. कष्टाने लघ्वी होते. बस्तीत वेदना आणि वृषणात सूज येते. दाबल्यानंतर तेथे तो दाबला जाऊन नाहीसा होतो.
शर्करामेह, सिकतामेह व भस्ममेह हे याचेच प्रकार होत.
**मूत्रमार्गात खडा गेल्याची लक्षणे**–कुशीत शूळ, हृदयात पीडा, वांती, तहान, अरुचि, अंग गळणे, दुर्बलता, कृशता, त्वचेचा पांढरेपणा, उष्णवात. वातजादि तिन्ही मूतखडे मुलांना होतात. शुक्राचा खडा त्यांना होत नाही, मोठ्यांनाच होतो.
**–व्रण**–पु., **बस्तेरश्मरीहरणशस्त्रकर्मजन्यव्रणः** ( सुशा. ६.३४ )
मूतखडा काढताना शस्त्रकर्मामुळे झालेला व्रण.

**अश्मोत्थ**–न., **खनिजद्रव्य०, शिलाजतु** ( रा. १३.२२९ )
शिलाजित.

**अश्रद्धा**–स्त्री. **रोगलक्षण०, अश्रद्धायां मुखप्रविष्टस्याऽऽहारस्याऽभ्यवहरणं भवत्येव परंत्वनिच्छा. रसप्रदोषजरोगेष्वेकः** ( चसू. २८.९ )
**रोगांचे लक्षण**–तोंडात घातलेले अन्न खाल्ले जाते परंतु इच्छा नसते. रसदुष्टीचा एक रोग.

**अश्रु**–न., **नेत्रोदकम्** ( सुउ. ५५.४ )
डोळ्यातील पाणी, आसू.

**–जोदावर्त**–पु., **उदावर्तव्याधिविशेषः हर्षशोकाभ्यां समुद्भूतान्यश्रूणि तेभ्यः समुत्पन्न उदावर्तः । आनंदजं शोकसमुद्भवं वा अश्रुप्रवृत्त्युन्मुखं यः निग्रहान्न मुंचति तस्य शिरोगुरुत्वं तीव्रा नयनामयाः पीनसप्रतिश्यायादयश्च भवन्ति ।** ( सुउ.५५.१२ ड )
आनंद शोक इत्यादिकांनी अश्रू ओघळणार इतक्यात ते मनोनिग्रहाने आवरले, त्यांचा रोध केला, ते आडवले, थांबवले तर हा रोग होतो.
लक्षणे–डोके जड, पडसे, नाकाचे इतर रोग व डोळ्याचे रोग होतात.

**–पात**–पु., **लक्षण० रोदनम्** ( सुशा. २.२५ )
आसू गळणे–ओघळणे, रडणे, एक लक्षण.

**–मार्ग**–पु., **अश्रुस्रोतः** ( सुउ. १. ११.१२ )
अश्रुवह स्रोतसे.

**–मोक्ष**–पु., **लक्षण० अश्रुनिःसारणम्** ( सुउ. ५५.२८ )
अश्रु वाहणे, गळणे, ओघळणे, सोडणे.

**–सिरा**,–( ड सुउ. २.५ )
अश्रुवाही शिरा, अश्रुवाहिनी धमनी ( मा. मधुकोश )
अश्रुवहन करणारी शीर, अश्रुवहन करणारी धमनी.

**अश्र्वागमन**–न., **रोगलक्षण० अश्रूणाम् आगमनम्** ( चनि. १.३३ ) आसू येणे.

**अश्व**–पु., **पशु० घोटक** ( च.सू. २७.३५ ) घोडा.
**कफप्रकृतिकोऽयम्** ( सुशा. ४.७६ )
**अश्वमांसगुणाः–उष्णं, लघु, बल्यं, पित्तकरं, दाहकरं, वातघ्नं. प्राणि० श्वेताश्वस्य खुरमषीनवनीतेन युक्ता व्यङ्गेष्वञ्जनार्थमुपयुज्यते** ( असंउ. ३७ पृ. २७९ )
**अश्वजद्रव्याणाम् उपयोगाः—**
**दन्तः–एडगजादियोगे कुष्ठप्रशमनार्थम् उपयुक्तः** ( चचि. ७.१६० )
**पित्तम्–शिरःस्थितविषप्रशमनार्थम् उपदिष्टम्** ( चचि. २३.७२. )
**मांसम्–शोषिणे हितम्** ( सुउ. ४१.३७ )
**मूत्रम्–दीपनं कटुतीक्ष्णोष्णं वातचेतोविकारनुत् वातहरं कृमिदद्रुषु शस्तं च** ( सुसू. ४५.२२५ )
**कुष्ठविषव्रणापहम्** ( सुसू. १.१०४ )
**शकृद्रसः– रक्तपित्तशमनः** ( चचि. ४.६९ )
**अश्वास्थिक्षारः–हस्तिमेहे पानार्थमुपयुज्यते** ( सुचि. ११.९ )

घोड्याची प्रकृति कफाची–**मांसाचे गुण**–उष्ण. हलके, पित्तकर. वातनाशक, दाहकारक, बलवर्धक. **खुर**–पांढऱ्या घोड्याच्या खुराची मषी–कोळसा बारीक करून लोण्यात कालवून लावावे म्हणजे हे वांगावर उपयुक्त होते. **पित्त**–डोक्यातील विषारशामक. **दात**–तरवड इत्यादि औषधी योगात, कुष्ठाकरिता. **मांस**–क्षयाकरिता. **मूत्र**–अग्निदीपक, तिखट, तीक्ष्ण, उष्ण, वातज मानसिक विकारनाशक, कृमि, गजकर्ण, कुष्ट, विष, व्रणनाशक. **लेंडीचा रस**–रक्तपित्तातील रक्तस्रावशामक, हाडाचा क्षार, हत्तीप्रमेहावर पिण्याकरिता.

**–कटक**–पु., **घोटककविकाचूडकम्** ( सुसू. ७.१५ )
घोड्याच्या लगामाची चुडी–बांगडी–गोलकडी.

**–कर्ण**–पु., **वनस्पति० शालवृक्षः सर्जरसभेदः जांगलदेशे विशेषेण जायते** ( चक. १.८ ) **सर्जभेदः** ( सुक. ६.२२ ) **ह्रस्वशालाः गन्धमुण्डः अश्वत्थसदृशो वृक्षः पूर्वदेशे प्रसिद्धः** ( सुसू. ३८. ८.९ )
**हिमालयोत्तरे पार्श्वे अश्वकर्णो महाद्रुमः** ( र. २.१४२ )
साग, राळेचा वृक्ष. त्याचा एक प्रकार. वातभूयिष्ठ जांगल देशात हा अधिक होतो. लहान वृक्ष. पिंपळासारखा, पूर्वेकडील देशात प्रसिद्ध आहे. हिमालयाच्या उत्तरेच्या उतरणीवर हा महावृक्ष असतो.
**अश्वकर्णः गर्दभाण्डः** ( सुउ. ३१.५ )
लाखी पिंपरी.
**जरणद्रुमः** ( रापरि. ९.३ )
लांब पानाची कडु तिखट रक्तपित्तनाशक रक्तदोषनाशक अशी वनस्पति.
**कुशिकः** ( अहसू. १५.१९ ) साग. बेहडा.
**जरणद्रुमोऽश्वकर्णस्तार्क्ष्यप्रसवश्च सस्यसंवरणो धन्यश्च दीर्घपर्णः कुशिकस्तरुः कौशिकश्चापि** ( रा.परि.९.३ )
**अश्वकर्णगुणाः—अश्वकर्णः कटुस्तिक्तः स्निग्धः पित्तास्रनाशनः । ज्वरविस्फोटकण्डुघ्नः शिरोदोषार्तिकृन्तनः ॥** ( रापरि. ९.३ )
**गुण**–तिखट, कडु, स्निग्ध, रक्तपित्तातील रक्तस्राव-

नाशक, ज्वर, फोड, खाज, डोक्याचे दोष व दुखणे नाशक. ह्याची पर्याय नावे मुळांत आहेत.
**उदर्दप्रशमनगणे** ( चसू. ४.१७ )
अंगावर येणाऱ्या कफपित्ताच्या चकंदळांवर उपयुक्त. औषधांच्या गणांतील एक.
**अश्वकर्णत्वक्चूर्णं व्रणरोपणार्थमुपयुक्तम्** ( सुसू. ३७.२७ )
सालीचे चूर्ण व्रण रुझवून आणण्याकरिता.
**उपदंशे लेपनार्थम्** ( सु. उ. ३१.५ )
गरमीच्या सुजेवर व व्रणावर लेप देण्याकरिता.
**अस्य पुष्पं महासुगंधिनामागदे उपयुक्तम् ।** ( सुक. ६.२२ )
फूल—महासुगंधी नावाच्या विषनाशक योगात उपयुक्त.
**अश्वकर्णस्य फलं कषायरसप्राये क्षीरिवृक्षफलादिवर्गे वर्णितम्** ( सुसू. ४६.१६३ )
फळ—तुरट रसाच्या वड पिंपळ यांसारख्या क्षीरीवृक्षांच्या फळ इत्यादी वर्गात.
**फलगुणाः—कषायं, मधुरं, रूक्षं, गुरु, शीतलं, लेखनं, विबन्धाध्मानजननं, स्तम्भनं, वातकोपनं, कफपित्तजित्** ( असंसू. ७.१८१.८४ )
गुण—तुरट, गोड, रूक्ष, जड, थंड, दोष खरडून काढणारे, मळ बांधून पोट फुगविते. मळाचे स्तंभन करणारे, वातवर्धक व कफपित्तनाशक.
**अश्वकर्णः मधुस्रवा इति नाम्ना पूर्वदेशे प्रसिद्धः चतुष्पादादिनखदन्तपरिक्षते अयं लेपार्थम् उपयुज्यते ।** ( असंउ. ४६ )
मधुस्रवा नावाने पूर्व देशात प्रसिद्ध, चतुष्पादादिकांच्या नख, दातांच्या जखमांवर लेप करण्याकरितां.

N. O.—Dipterocar paceae
L.—Shorea Robusta Gaertu
Eng.—Sal Tree
हिं.—साल
म.—साल
गु.—साळ
बं.—साल, राल, धूना
त.—तल्लरा Taloora

**अस्थिभग्न० काण्डभङ्गस्य प्रकारः अश्वकर्णवद् विपुलास्थिनिर्गमादश्वकर्णम्** ( सुनि. १५.१० )
भंगलेल्या हाडाचा प्रकार, हाडाचा तिरका तुटलेला तुकडा बाहेर येतो तो घोड्याच्या कानासारखा दिसतो.

**—कर्णक—**न., **अस्थिभग्न० अश्वकर्णम्** ( सुनि. १५.१० )
हाडभंग, भंगलेल्या हाडाचा प्रकार.

**—क्षुर—**पु., **वनस्पति० गिरिकर्णिका** ( ध. ४.८४ )
गोकर्णी,—पांढरी, निळी.

**—खरज—**पु., **पशु० अश्वतरः** ( ध. ३८४.२६७ )
खेचर.

**—खुरक—**पु., **वनस्पति० स्यंदन—कोकिलाक्षः** (चक्र.) **स्वेतस्पंदः** ( चचि. २३.२४५ )
**स्यंदन** एक वनस्पती. स्यंदन, तिवस.
**कोकिलाक्षः** तालीमखाना.

**—खुरा—**स्त्री., **वनस्पति०, गिरिकर्णी** ( असंउ. ४ पृ. ३९ ) गोकर्णी.

**—गन्ध— पशु० गवयः** ( धपरि. ६.३४ )
गवा, वनगाय.

**—गन्धा—**स्त्री., **वनस्पति०** ( चसू. ४.१० )
**इयं मदगंधिका कषायतिक्तरसा, कटुः** ( रा. ४. ४०३; ध. १.२७२ )
**"अश्वगन्धाऽनिलश्लेष्मश्वित्रशोथक्षयापहा ।**
**बल्या रसायनी तिक्ता कषायोष्णातिशुक्रला ॥"** ( भा. प्र. ५.४.१९० )
**बल्यगणे** ( च. सू. ४.१० )
**बृंहणीयगणे** ( चसू. ४.९ )
**मूलम् ऊर्ध्वभागदोषहरम्** ( सुसू. ३९.३ )
**रसायनविधिनोपयुज्यते** ( असंउ. ४९ पृ. ४४५ )
**कृशानां पुष्टिं कुरुते** ( रा. १८.१८७)
**कर्णपालिरोगेऽभ्यंगतैले उपयुक्तम्** (सुचि. २५.२६)
**व्रणरोपणवर्तिषूपयुज्यते** ( सुसू. ३७.२३ )
**श्लेष्मजशोफप्रलेपे उपयुक्तम्** ( सुसू. ३७.६ )
**कण्ड्वादिहरमुद्वर्तनार्थम्** ( चसू. ६.८ )
**अश्वगंधाक्षारं श्वासे मधुसर्पिषा सह लिह्यात्** ( चचि. १७.१७० )
**अश्वगंधासवः प्रसहमांसाशने अनुपानार्थं उपदिष्टः** ( सुसू. ४६.४३३ )
**वनस्पति० अश्वगन्धा** ( र. २०.१३५ ) आस्कंद
एक वनस्पती—तुरट, कडु, तिखट, उष्ण, वातकफनाशक, बलवर्धक, रसादि धातूंचे पोषण सुधारणारी, अति शुक्रवर्धक, क्षय, सूज, व कोड नाशक कृश मनुष्याला पुष्ट करते, रसायन म्हणून उपयुक्त

त्या विधीने द्यावे. शरिराच्या वरच्या भागातील दोष-नाशक. तेल—कानाच्या पाळीच्या रोगात लावावयाच्या तेलात चांगले.

वात—व्रण रुझवून आणावयाच्या वातीला लावण्यास. लेप—कफज सुजेवर लेप देण्यास. उटणे—कण्डू इ० नाशार्थ उटण्यात उपयुक्त. क्षार—श्वासावर मधतुपात चाटवावा. आसव—आक्रमक, हिंसक प्राण्यांचे मांस खाल्ल्यावर अनुपानाकरिता.

**—घ्न**—पु., **वनस्पति० करवीर** ( ध. ४.१ ) कण्हेर, पांढरी कण्हेर.

**—घ्नी**—स्त्री. **वनस्पति० तेजोवती** ( ध. १.२६६ ) पिवळे तेल निघणारी वेल.

**—जल**—न., **अश्वमूत्रम्** ( र. ५.२२३ ) घोड्याचे मूत.

**—तर**—पु., **पशु० वेगसरः स च— अश्वायां खराज्जातः** ( च. सू. २७.३५ ) **प्रसह वर्गीय प्राणी.**
एक पशू. घोडीला गाढवापासून झालेला; खेचर.

**अश्वत्थ**—पु., **वनस्पति०, पिप्पलः** ( चक. १.८; सुसू. ३८.४८ ) पिंपळ.

**( अश्वत्था )**—स्त्री., **वनस्पति० श्रीवल्ली.** ( रापरि. ८.३३ )
आंबट तिखट व अति आंबट फळांची कांटेरी वेल.

**( अश्वत्थी )**—स्त्री., **वनस्पति० पिप्पलीभेद.** ( रा. ११.१२२ ) पिंपळीचा प्रकार, पानपिंपळी.

**—फलम्**—न., **पिप्पलस्य फलम्** ( चसू. २७.१६४ ) पिंपळाचे फळ.

**—फला**—स्त्री., हपुषा. ( ध. २.९ ) ( रा.४.१४ ) लहान शेरणी.

**—बला**—स्त्री., **शाक०**
**शाकं आश्वबलं रूक्षं बद्धविण्मूत्रमारुतम्** ( सुसू. ४६.२६१ ) **अर्शःसु क्षारपातनानंतरं पथ्यम्; शाकार्थमुपयुज्यते** ( सुचि. ६–८ )
मेथी गुण—रूक्ष, मळमूत्र वात यांचे स्तंभन करणारी, मूळव्याधीत क्षार लावून मोड गळून गेल्यावर पथ्याला चांगली उपयुक्त भाजी.

**—मार**—पु., **वनस्पति० करवीरः, श्वेतकरवीरः, स्थावर-मूलविषविशेषः** ( सुक. २.५ )

**—मारक**—पु., **करवीरः** ( ध. ४–१; रा. १०.१ ) पांढरी कण्हेर.

**—मूत्री**—स्त्री., **वनस्पति० सल्लकी.** ( ध. ३.१३५; सुउ. ४२.९४,९५ ) साळई वृक्ष.

**—मोहक**—पु., **वनस्पति० करवीरः** ( ध. ४.१. ) कण्हेर

**—युज्**—पु., **नक्षत्र० अश्विनी.** ( चक. ९.१३ ) अश्विनी नक्षत्र. २७ नक्षत्रांपैकी पहिले.

**—रोधक**—पु., **वनस्पति० करवीरः** ( रा. १०.१. ) वनस्पती, कण्हेर.

**—लिण्ड**—न., **अश्वशकृत्** ( असंउ. २ पृ. २६ ) घोड्याचा मळ—लेंडी—पुरीष.

**—संनिभा**—स्त्री., **वनस्पति० पिप्पलीविशेषः** पिंपळीचा एक प्रकार. पानपिंपळी. ( रा. ११.१२२ )

**—हन्**—पु., **करवीरः** ( चसू. ३.१७; ध. ४.१. ) कण्हेर.

**अश्वा**—स्त्री., तुरगी. **अश्वादुग्धम् अम्लं, लवणं, लघु, वृष्यं, दीपनं, देहस्थैर्यकरं, बल्यं, गौरवकांतिकृत्, सरं, रुचिकरं, श्वासवातहरम्** ( ध. ६.१७२ ) **अश्वायाः शकृद्रस—क्षीर—मांसरस—रुधिरैर्द्राक्षाऽश्व-गन्धा—मगधा—सिताभिः सिद्धम् घृतं शोषघ्नम् ।** ( सुउ. ४१.४९ )
घोडी. **दूध**—आंबट, खारट, वृष्य, हलके, अग्निदीपक सारक, वातनाशक, रुचि करणारे, श्वासनाशक, शुक्रवर्धक, बलकारक, शरीर स्थिर व भारी कर-णारे, आणि अंगकांति, मांस, रस, रक्त, वाढवणारे आहे. **लेंडीचा रस**—द्राक्षे, आसकंद, पिंपळी, खडीसाखर यांनी सिद्ध तूप क्षयावर हितकर.
स्त्री., **वनस्पति० अश्वगन्धा.** ( अहृचि. २३ ) आस्कंद

**अश्वाऽपान** न., **वडवायोनिः** ( सुसू. २३.१२ ) घोडीची योनि.

**अश्वान्तक**—पु., **वनस्पति० करवीरः** ( रा. १०.२ ) कण्हेर.

**अश्वावरोहक**—पु., **वनस्पति० अश्वगन्धा** ( ध. १.२७२ ) **अश्वकर्णः इक्षुरको वा.** ( चसि. १०.३७ ) एक वनस्पती. आस्कंद. राळेचा वृक्ष, तालीमखाना

**अश्वावरोहिका**—स्त्री., **अश्वगंधा.** ( चसि. १०.३७ ) आस्कंद

**अश्विन्**—पु., देवता० ( **नित्यं द्विवचनान्तः** ) **अश्विनौ**
**अश्विनौ देवभिषजौ यज्ञवाहाविति स्मृतौ ।**
**प्रजापतेरायुर्वेदमधीत्येन्द्राय दत्तवन्तौ ॥** ( चसू. १.४.५ )
**यज्ञस्य च्छिन्नं शिरस्ताभ्यां पुनः समाहितं; पूष्णः**

प्रशीर्णाः दशनाः भगस्य नष्टे नेत्रे वज्रिणो भुजस्तम्भश्च ताभ्यामेव चिकित्सितः पुनः सुखीकृतः सोमाभिपतितश्चंद्रो राजयक्ष्मणा गृहीतश्च चिकित्सितः पुनः सुखीकृतः ।
वीतवर्णस्वरोपेतो विकृतिं गतः कामी भार्गवश्च्यवनो वृद्धः सन् ताभ्यां पुनर्युवा कृतः । एतैरन्यैश्च बहुभिः कर्मभिर्भिषगुत्तमौ इन्द्रादीनां महात्मनां भृशं पूज्यौ बभूवतुः । द्विजातिभिः ग्रहाः स्तोत्राणि मन्त्राः धूम्राः पशवस्तथा नाना हवींषि च ताभ्यां प्रकल्प्यन्ते । शक्रोऽश्विभ्यां सह स्तवने सोममश्नुते भगवान् सौत्रामण्यामश्विभ्यां सह मोदते । वेदवाक्येषु इन्द्राग्नी अश्विनौ च द्विजैर्यथा स्तूयन्ते । न तथाऽन्या देवताः । अजरैरमरैर्विबुधैरधिपैर्ध्रुवैर्भिषजावश्विनौ पूज्येते ।
( चचि. १.४ ४० तः ४९ )
एक देवता. नेहमी द्विवचनी प्रयोग. अश्विनौ हे देवांचे वैद्य. यज्ञात हविर्भागाचे अधिकारी. त्यांनी प्रजापतीपाशी आयुर्वेदाचे अध्ययन करून तो इंद्राला शिकविला. अश्विनीकुमारांनी यज्ञाचे कापलेले डोके पुन्हा सांधले. पूषन् या बारा आदित्यांपैकी एका देवतेचे दात गळून पडले होते ते पुन्हा निर्माण केले. त्यापैकीच भग या विवाहदेवतेचे आंधळे झालेले डोळे बरे केले. इंद्राचे आखडलेले हात चांगले केले. चंद्राचा राजयक्ष्मा–क्षय–नाहीसा केला. असे सर्वांना सुखी केले. आरोग्यसंपन्न केले. ज्याचा वर्ण स्वर बिघडला असा अति विषय सेवन करणारा वृद्ध च्यवन ऋषि पुनः तरुण केला; अशा अनेक यशस्वी औषधोपचारांनी जे वैद्यवर समजले गेले ते अश्विनीकुमार इंद्रादिकांनी पूज्य मानले. इंद्र अश्विनीकुमारासह यज्ञात सोमपान करतो व सौत्रामणी यज्ञात आनंद अनुभवितो. ब्राह्मण इंद्र, अग्नि, अश्विनीकुमार यांची वेदांच्या ऋचांनी जशी स्तुति करतात तशी अन्य देवतांची करीत नाहीत. तशीच अश्विनीकुमारांची स्तुति ज्यांना वार्धक्य नाही, मरण नाही, शहाणे, मुख्य, शाश्वत असे देव करतात व त्यांची पूजा करतात. ब्राह्मणही त्यांना सोमपान करावयाची पात्रे स्तोत्र, मंत्र, कपिल–पिंगटवर्णाचे पशू तसेच नाना प्रकारचे अन्न, तूप इत्यादी त्यांच्या करिता देतात.

**अष्टन्**–वि., **संख्या०** ( चसू. १९.१ )
आठ संख्या, अंक

**–कट्वर**–न., **योग० गृध्रस्यूरुग्रहादिषूपयुज्यते** ( चचि. २७.४७ )
ताक. औषधियुक्त ताक. कमरेतून मांडी, पोटरी, टाच, पावलापर्यंत दोरीसारखी चमकणारी वेदना होणारा विकार ( गृध्रसी ), मांडी जखडणे इत्यादी विकारात उपयोगी.

**–धातुकी**–वि., **अष्टतत्त्वसमुदायात्मिका खादिपञ्चकबुद्ध्यव्यक्ताहंकाररूपा** ( चशा. १.६३ ) ( चशा. ११.७ )
आठ धातु–धारक–घटक–तत्वे एकत्र असलेली आकाशादि पाच व बुद्धि अहंकार आणि अव्यक्त मिळून अष्टधातुकी होते.

**–पदी**–स्त्री., **वनस्पति० मल्लिका** ( ध. ५.१३४ )
मोगरी, मोगऱ्याचे फूल.

**–मान**–न., **मान० प्रसृतम् द्वे पले प्रसृतं विदुः अष्टमानं तु विज्ञेयं ।** ( चक. १२.९३ )
दोन पळे; आठ तोळे; प्रसृत एक तोल. एक मापन. वजन.

**–मासिकरसायनम्**–न., **सिद्धौषधि०** ( र. २६.१७.२२ ) एक सिद्धऔषधि.

**–रात्र**–न., **अष्टमी रात्रिः अष्टरात्रमन्तरं कृत्वा अष्टानां रात्रीणां समाहारः** ( चसू. ५.१५ )
आठ रात्री. आठ रात्रींचे अंतर ठेवून आठ रात्रींचा काळ. अखंड आठ रात्री.

**–रूप**–वि., **अष्टौ रूपाणि यस्य तत्; यथा अष्टरूपम अव्यक्तम्** ( सुशा. १.३ )
प्रकृति इत्यादि आठ रूपें ज्याची आहेत ते. जसे–अष्टरूप अव्यक्त.

**–वर्ग**–पु., **गणविशेषः**
**द्वे मेदे द्वे च काकोल्यौ जीवकर्षभकौ तथा ।**
**ऋद्धिर्वृद्धिश्च तैः सर्वैरष्टवर्ग उदाहृतः ॥**
( शार्ङ्गधर मअ. १९ )
अष्टवर्ग. आठांचा वर्ग. दोन मेदा, दोन काकोल्या, जीवक, ऋषभक, ऋद्धि व वृद्धि या आठ वनस्पतींचा वर्ग.

**–विधशस्त्रकर्मीय**–पु., **अष्टविधशस्त्रकर्माधिकृत्य कृतोऽध्यायः सुश्रुते सूत्रस्थानस्य पंचविंशतितमः अध्यायः ।** ( सुसू. २५.१ )
आठ प्रकारचे शस्त्रकर्म, ह्या विषयाचे विवेचन केलेल्या सुश्रुतसंहितेतील अध्यायाचे नाव.

**–शतो ( ता )रिष्ट**–पु., **योग० काश्मर्य धात्रीत्यादीनां सप्तफलानां जीर्णगुडस्य च प्रत्येकं शतमस्मिन् अरिष्टे उपयुक्तम्। एतदरिष्टं शोथशामकम्।**
( चचि. १२.३२, ३३. असंचि. १९ )
एक योग० शिवण, आवळा इत्यादी सात फळे व जुना गूळ ही शंभर शंभर तोळे घेऊन त्यांचे केलेले अरिष्ट; हे सूजनाशक आहे.

**–( अष्टा ) कपाल**–वि., **अष्टसु कपालेषु पाचितः हविर्द्रव्य०** ( काशा. जातिसूत्रीय० ८ )
आठ खापरात भाजलेले–शिजविलेले होमाचे एक द्रव्य.

**–पद**–न., **खनिज० सुवर्णम्** ( रा. १३.२. )
पु., **चतुरंगक्रीडनार्थं पटः** ( सुसू. ३०.१९ )
**अष्टपदेन लेखाभिः कोष्ठसंतानं चतुरंगक्रीडनार्थमुच्यते** ( ड.सुसू. ३०.१९ )
खाणीतले सोने.
सारीपाट, सोंगट्यांचा पट रेघांनी ८।८ चौकट घरे केलेला ४ पट्टे ४ बाजूला शिवून केलेला बुद्धिबळाचा पट.

**अष्टांग**–वि., **अष्टावंगानि यस्य** ( सुसू. १.९ ) **शल्यं, शालाक्यं, कायचिकित्सा, भूतविद्या, कौमारभृत्यम्, अगदतन्त्रं, रसायनतन्त्रम्, वाजीकरणतन्त्रमिति अष्टावङ्गान्यायुर्वेदस्य एवमयमायुर्वेदोऽष्टाङ्ग उपदिश्यते।** ( सुसू. १.७.९ )
ज्याला आठ अंगे आहेत असा. १ शल्य काढण्याचे शस्त्रकर्म २ सळईने औषधांचा उपयोग करावयाच्या कान, नाक, डोळे इत्यादींचे रोगांची चिकित्सा, ३ ताप, अतिसार अशा रोगांची–अग्नीची चिकित्सा ४ सूक्ष्म अदृश्य जीवाच्या शरीरप्रवेशामुळे होणाऱ्या रोगांची चिकित्सा, ५ बालकांच्या रोगांची चिकित्सा, ६ विषांची चिकित्सा, ७ म्हातारपणाची चिकित्सा, व ८ प्रजा बलवान व्हावी म्हणून शुक्राचे सामर्थ्य निर्माण करावयाची माहिती ज्या अंगामध्ये दिली आहे. अशी आठ अंगे असलेला आयुर्वेद.

**–पूरण**–वि., **अष्टाङ्गानां पूरयिता.** ( असंसू. १ )
आठही अंगे पूर्ण करणारा.

**–लवण**–न., **भैषज्य०**
**सौवर्चलमजाजी च वृक्षाम्लं साम्लवेतसम्। त्वगेलामरिचार्धांशं शर्कराभागयोजितम् ॥ एतल्लवणमष्टांगमुच्यते। तत् परमग्निसंदीपनं स्रोतोविशोधनं कफप्राये मदात्यये उपयुज्यते।**
( चचि. २४.१७७, १७८ )



एक औषधियोग. यात पादेलोण, जिरे, अमसूल, अम्लवेतस, दालचिनी, वेलची, मिरे ही समभाग घेऊन यांचा अर्धा भाग साखर घालून योग होतो, हे चांगले अग्नि वाढविणारे, स्रोतसांची शुद्धि करणारे, व कफाधिक मद्यपानजन्य विकारावर उपयुक्त.

**–संग्रह**–पु., **अष्टाङ्गानि संहृत्य कृतः संग्रहः**
( असंसू. १ ) आयुर्वेदाची आठ अंगे एकत्र केलेला संग्रह–अष्टांगसंग्रह.

**–हृदय**–न., **वाग्भटकृत आयुर्वेदीयो ग्रन्थः**
( अहसू. १.५ ) वाग्भटकृत आयुर्वेदीय ग्रन्थ

**अष्टोदरीय**–पु., **चरकसूत्रस्थानस्य एकोनविंशोऽध्यायः**
( चसू. १९.१ )
चरकसूत्रस्थानातील एका अध्यायाचे नाव. आरंभी आठ उदरांच्या उल्लेखामुळे ते नाव दिले.

**अष्टौनिन्दितीय**–पु., **चरकसूत्रस्थानस्यैकविंशोध्यायः**
( चसू. २१.१ )
चरक सूत्रस्थानातील एका अध्यायाचे नाव–शारीर विषयक निंद्य अशा आठ दोषांचे विवेचन असलेला.

**–अष्टामिका**–स्त्री., **मान० द्वे सुवर्णे.**
( चक. १२.९१ )
**कर्षद्वयम्** ( असंक. ८ ) तोल. मापन. वजन. दोन तोळे.

**अष्टील ( ला )**–स्त्री., पु., **उत्तरापथे प्रसिद्धो वर्तुलपाषाणः चर्मकाराणां वर्तुलदीर्घोलौहिभाण्डिः**
( ड सुनि. १.९० )
**दीर्घो लोहमयो ग्रन्थिर्लोहकारेषु प्रसिद्धः.** ( चक्र )
( चचि. १३.३७ )
**शारीर० नरशरीरे ग्रन्थिसदृशो बस्तिद्वारस्थितोऽवयवः पौरुषमित्यपरं नाम.**
( सुनि. ३.१९ )
**रोग० त्रयोदशबस्तिविकारेष्वेकः तत्संप्राप्तिलक्षणे–वायुर्बस्तिगुदमाध्मापयन्रुध्वा चोन्नतां चलां तीव्रार्तिमष्ठीलां करोति, तया मूत्रविण्मार्गाणामवरोधो भवति।** ( चसि. ९.३६ )
उत्तर प्रांतात गोल दगड प्रसिद्ध. लंब गोल आकाराचे लोखंडी भांडे; पेटी; लांबट गोल लोखडांचा गोळा लोहारांकडे असतो तो. शारीर अवयव–पुरुषाच्या शरिरात ग्रंथीसारखा बस्तीच्या द्वारात असलेला अवयव. पौरुषग्रंथी–१३ वस्ति विकारांपैकी एक रोग. संप्राप्ती व लक्षणे–प्रकुपित वायु बस्ति व गुद यांना व्यापून रोध करून उंचावलेली हालणारी तीव्र वेदना

होणारी आठळीसारखी गाठ करतो. तिच्याने लघ्वी व मळ यांच्या मार्गाचा रोध होतो व मार्ग अडविला जातो.

**सुश्रुतेऽयं रोगो वातविकारेषु " वाताष्ठीला " इति नाम्ना वर्णितः ।** ( सुनि. १.९० )

**अष्ठीलिकाऽस्य पर्यायः** ( शारं. १.७.१०९ )

सुश्रुतात हा विकार वातविकारात आहे. नाव वाताष्ठीला आहे. अष्ठीलिका हा आणखी एक पर्याय.

**अष्ठीलाश्मन्**–पु., **दीर्घवर्तुलपाषाणः उपयंत्रम्** ( सुसू. ७.१५ )

**अस्थिदेशोत्तुण्डितस्य शल्यस्याहरणार्थं हस्ततल-भग्नस्य चिकित्सार्थमस्योपयोगः** ( सुचि. ३.३५; सुसू. १७.११ )

लंबगोल दगड. एक उपयंत्र. अस्थिमध्ये उत्तुण्डित–वर टोक आहे असें शल्य काढण्याकरिता व हाताच्या तळव्याचा भंग झाल्यास त्याच्या चिकित्सेकरता उपयुक्त.

**अष्ठीलिका**–स्त्री., **वातरोगः, वाताष्ठीला अष्ठीला वा ।** ( र. १८.१८७ )

**गुह्यरोगः, विषमा कठिना भुग्ना वातकृता पिटका ।** ( अहउ. ३३.१६ )

**सुश्रुतेऽयं रोगः शूकदोषेषु लिखितः** ( सुनि. १४.५ )

एक वातरोग० वाताष्ठीला किंवा अष्ठीला. जननें-द्रियावर होणारी एक पुळी. ही वाकडी, कठीण, आणि तिचा काही भाग उंच काही नीच असतो. जननेंद्रिय जाडे व मोठे करण्याच्या उपचारात चूक झाल्याने हा शूकदोष होतो असे सुश्रुतात म्हटले आहे.

**असंकीर्ण**–वि., **असंकटम्, असंकुलम्** ( सुसू. ४६.४४६ )

धोका नसलेले, संकट नसलेले, विस्तृत.

**असंकुलप्रकरण**–वि., **अनाकीर्णप्रकरणम् अमिश्रीकृतप्रकरणं वा ।** ( चवि. ८.३ )

विषयानुरूप प्रकरण. अनेक विषयांचे मिश्रण नसलेले प्रकरण.

**असंजातसारत्व**–न., **काठिन्याभावः** ( असंशा. ४ )

कठिणता न आलेले. विशुद्धतर धातुत्व निर्माण न झालेले.

**असंवृतगुद**–रोगलक्षण० **असंकुचितगुदः विवृतगुदः ।** ( सुउ. ४०.२१ )

रोगाचे एक लक्षण. न आवळलेले गुद; बंद नसलेले गुद; गुदद्वार खुले असणे, उघडे गुद, न मिटलेले गुद.

**असंसर्ग**–वि., **असक्तवेगः** ( चक्र. चसि. १२.९ )

मलमूत्र विसर्जनाचे वेग व्यवस्थित असलेला. मल-बद्धता मूत्ररोध इत्यादीचा अवरोध नसलेला.

**–अमैथुनम्**–पु., ( सुसू. १९.१५ ) मैथुन न करणे.

**असंहत**–वि., **नात्यच्छं नातिघनम्** ( सुसू. १४.२२ )

**द्रवम्** ( अहसू. २७.१ ) अतिपातळ किंवा अति घट्ट नसलेले, सरबरीत, मध्यम-द्रव, पातळ.

**असत्**–वि., **अनाचारः पुरुषः** ( सुचि. २४.१३३ )

अनाचारी–दुराचारी–दुर्वर्तनी मनुष्य.

**–पक्ष**–पु., **अनागमपक्षसिद्धः पक्षः** ( चसू. ३०.८२ )

अनागमाची बाजू–मत सिद्ध न करणारा पक्ष. आगम-शास्त्रकारांचे विधान किंवा शास्त्रकारांची विधाने चूक आहेत असे दाखविण्याचा प्रयत्न करणारा पक्ष.

**–प्रदर्शिन्**–पु., **रोगलक्षण० अयथार्थं पश्यति** ( सुउ. १९. ६.७ )

जसे असते तसे न पाहणारा–विकृत पाहणारा.

**–वादिन्**–**प्रतिरसपाकवादी, पाकत्रयवादी, गुणकर्तृत्व-वादी वा सुश्रुतमतानुसारेणासद्वाद्यस्ति.** ( सुउ. ६५.५ )

खोटे बोलणारे. प्रत्येक रसाचा पाक त्याच रसात होतो असे मानणारे, तीन पाक मानणारे, गुणांचे कर्तृत्व मानणारे सुश्रुतमतानुसार असद्वादी होत.

**( असद् ) ग्रहणम्**–न., **अयथार्थज्ञानम्** ( चसू. २५.४० )

अयोग्य, खोटे–चुकीचे ज्ञान, चुकीचा समज.

**असन**–पु., **वनस्पति० उदर्दप्रशमनगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१७ )

अंगावर उठणाऱ्या पित्ताच्या चकंदळांचे शमन करणाऱ्या गणातील एक द्रव्य.

**दन्तकाष्ठोपयोगि द्रव्यम् ।** ( चसू. ५.७३ )

दातवणाच्या उपयोगी याची काडी येते.

**बीजकः पूर्वदेशे प्रसिद्धः छागकर्णसदृशपत्रः पीतशालः** ( सुसू. ३८. ८ )

पूर्व देशात प्रसिद्ध. शेळीच्या कानासारखी पाने असलेला, पिवळा शाल, असाणा.

**शृङ्गाटकादिवर्गोक्तं प्रमेहघ्नमेकं द्रव्यम्** ( सुचि. ११.१० )

**बीजकसारः** ( ड. सुचि. ९.३० )

**विजयसारः** ( र. २०.९८ )

**अशनस्तु महासर्जः सौरिर्बन्धूकपुष्पकः ।**
**प्रियको बीजकः श्यामः सुनीलः प्रियशालकः ॥**

हीं असाण्याची नांवे आहेत.

**असनगुणाः—कटुकषायस्तिक्तः उष्णः सारकः कफवातघ्नः पित्तास्रवार्तगलदोषरक्तमण्डलादिरोगघ्नः** ( ध. ५.१२५ )

असाण्याचे गुण—तिखट, तुरट, कडु, उष्ण, सारक, कफवातनाशक, रक्तपित्तविकारातील रक्तस्रावनाशक, वाताच्या वेदना, गळयातील दोष, व त्वचेवर येणारी लाल चकंदळे इत्यादी रोगनाशक.

**—पर्णी**—स्त्री., **वनस्पति० अपराजिता** (चवि. ८.१३९) **दारुपर्णी** ( चचि. २६.७० ) गोकर्णी.

**—पुष्पक** पु., **षष्टिकभेदः कृष्णषष्टिकः** ( सुसू. ४६.८) साठे तांदुळाचा प्रकार. काळी साळ.

**असनादि**—पु., **द्रव्यगणः असनः आदिः यस्मिन्। तस्य द्रव्याणि—असनतिनिशभूर्जश्वेतवाहप्रकीर्याः खदिर—कदरभण्डी शिंशपामेषशृङ्ग्यः त्रिहिमतलपलाशाजोङ्गकः शाकशालक्रमुकधवकुलिङ्गच्छागकर्णाश्वकर्णाश्च ।** ( अहसू. १५.१९.२० )

असन प्रधान असलेल्या द्रव्यांचा गट.

गटातील औषधे—असाणा, तिवस, भूर्जवृक्ष, अर्जुन व काटेकरंज, खैर, पांढरा खैर, सिरस, सिसव, मेंढशिंगी, तिन्ही चंदन, ताड, पळस, अगरू, देवदार, राळेचा वृक्ष, धावडा, सुपारी, इंद्रजव, अजकर्ण, साग.

**गुणाः—श्वित्रकुष्ठकफक्रिमिपांडुरोगप्रमेहमेदोदोषनिबर्हणः**

गुण—कोड, कुष्ठ, क्रमि, पांडुरोग, प्रमेह, मेद व कफनाशक.

**असन्धिभग्न**—न., **रोग०, भग्नप्रकारः संधिं त्यक्त्वाऽन्यस्थाने भग्नम्** ( असं. उ.२२ )

**सुश्रुतेऽस्य "काण्डभग्न" इति निर्देशः** ( सुनि. १५.४ )

**एतद् भग्नं द्वादशविधम्—कर्कटकम्, अश्वकर्णं, चूर्णितं, पिच्चितम्, अस्थिच्छलितं, काण्डभग्नं, मज्जानुगतम्, अतिपातितं, वक्रं, छिन्नं, पाटितं, स्फुटितमिति ।** ( सुनि. १५.८ )

एक रोग, अस्थिभंगाचा प्रकार. संधि सोडून अन्य ठिकाणी हाड मोडणे, भंगणे. सुश्रुतात याला कांडभग्न म्हणतात याचे १२ प्रकार मुळात सांगितलेल्या नावाचे आहेत.

**असम्पातिन्**—वि., **सुनिर्गतम्** ( चशा. ८.५१ ) चांगले निघालेले. व्यवस्थित बाहेर आलेले, पडलेले.

**असात्म्य**—न., **शरीरेण सह यदात्मतामविकृतरूपतां न याति तत्। एतेन यदुपयुक्तं प्राकृतरूपोपघातकं भवति तत् असात्म्यम्** ( चशा. १.१२७ )

जे शरिराशी आत्मसात्—एकरूप होत नाही, शरिराचे घटक बनत नाही, उलट उपयुक्त न होता शरिराला घातक होते ते असात्म्य.

**—अभ्याससात्म्याभावः** ( सुशा. १०.२८ )

सतत सेवन करूनही आत्मसात् न होणे. सवय नसल्याने आत्मसात् न होणे, नवीनच घेतल्याने आत्मसात् न होणे—शरिराला उपकारक न होता अपकार करणारे असणे.

**—ज**—वि., **सहसा पूर्वाभ्यासत्यागादपराभ्याससेवनाजातः ।** ( अहसू. ३०.५९ )

सवयीचे एकदम सोडून सवय नसलेले एकदम सेवन केल्याने, आत्मसात् न झाल्याने त्यापासून झालेले रोग.

**—भोजन**—न., **अनभ्यस्तद्रव्याणां सेवनम् ।** ( चचि. १५.४२ )

शरिरात आत्मसात् होऊ शकत नाहीत अशा पदार्थांचे जेवण. बिनसवयीचा आहार.

**—सेवन—अनभ्यस्तानां वाङ्मनःकर्मणां सेवनम्** ( काखि. ६.५८ )

सवय नसलेली वाचिक व मानसिक कामे करणे.

**असात्म्यार्थसंयोगः**—पु., **असात्म्यविषयेणेन्द्रियस्य संयोगः स त्रिविधः अयोगातियोगमिथ्यायोगरूपः ।** ( चशा. १.१२७ )

शरिराला आत्मसात् न होणाऱ्या विषयांचा इंद्रियांशी होणारा संयोग. बिनसवयीच्या विषयांचा इंद्रियांशी होणारा संयोग. तो कमी, अति व वेडावाकडा—विकृत असा तीन प्रकारचा संभवतो.

**असात्म्यार्थागम**—पु., **विषयाणां हीनमिथ्यातियोगाः असात्म्या भवन्ति, तथाविधविषयैः सह इंद्रियाणां संयोगः ।** ( चशा. १.९८ )

इंद्रियांशी कमी, अति व अयोग्य रीतीने त्या त्या विषयांचा संबंध येणे. हे संबंध—संयोग इंद्रियांना—शरिराला आत्मसात् करता येत नाहीत म्हणजे ते असात्म्य असतात. असात्म्य अशा विषयांचा अर्थांचा इंद्रियांशी योग येणे.

**असात्म्येन्द्रियार्थसंयोग**—पु., **असात्म्यार्थैः सहेन्द्रियाणां संयोगः** ( चनि. १.३ )

इंद्रियांशी—शरिराशी आत्मसात् न होणाऱ्या अशा असात्म्य विषयांचा इंद्रियांशी संयोग,

## असात्म्येन्द्रियार्थसंयोगसारणी

| इन्द्रियं | अयोगः | अतियोगः | मिथ्यायोगः |
|---|---|---|---|
| १ श्रवणम् | अश्रवणम् | अतिश्रवणम् | उच्चपरुषभीषणादिश्रवणम् |
| २ स्पर्शनम् | अस्पर्शनम् | अतिस्पर्शनम् | अभिघातविषवातादिस्पर्शनम् |
| ३ दर्शनम् | अदर्शनम् | अतिदर्शनम् | सूक्ष्मातिदूरभास्वद्दर्शनम् |
| ४ घ्राणम् | अनाघ्राणम् | अत्याघ्राणम् | पूत्यमेध्यातितीक्ष्णोग्राघ्राणम् |
| ५ रसनम् | अरसग्रहणम् | अतिरसग्रहणम् | अपथ्यविषमरसग्रहणम् |

सर्वव्याधिसाधारणं त्रिविधं निदानम् असात्म्येन्द्रियार्थ-
संयोगस्तस्मिन्नेकं निदानम्, प्रज्ञापराधः परिणामश्चान्यौ द्वौ।
( चशा. १.११८ तः १२६ ) ( चवि. १.३ )

## असात्म्य इंद्रियार्थांच्या संयोगाची सारणी

| इंद्रिय | अयोग | अतियोग | मिथ्यायोग |
|---|---|---|---|
| १ श्रवण ( कर्ण ) | न ऐकणे<br>थोडे ऐकणे | फार ऐकणे | अति मोठा कर्कश भयंकर<br>इत्यादी आवाज ऐकणे |
| २ स्पर्शन<br>( त्वगिंद्रिय ) | स्पर्श नसणे<br>थोडा असणे | फार स्पर्श<br>असणे | आघात, विष, विषारी-<br>वायु यांचा स्पर्श |
| ३ दर्शनेंद्रिय<br>( नेत्र ) | न पाहणे<br>थोडे पाहणे | फार पाहणे | सूक्ष्म अतिदूरचे अति तेजस्वी<br>पाहणे. |
| ४ घ्राणं<br>( नासा ) | वास न घेणे<br>थोडा वास घेणे | एकसारखा सतत वास<br>घेणे. फार वास घेणे. | कुजलेले, घाण, अतितीक्ष्ण<br>उग्र वास घेणे, |
| ५ रसना<br>( जिव्हेंद्रिय ) | रस न घेणे<br>थोडा रस घेणे | अतिरस घेणे | बिन सवयीचे, अपथ्यांचे<br>नियमविरहित सेवन |

सर्व रोगांना सर्वसाधारण तीन प्रकारची कारणे होतात. त्यांत असात्म्येंद्रियार्थसंयोग ( वर आहेच ) हे एक कारण व प्रज्ञापराध ( बुद्धि, मन नको म्हणत असता ते करणे ) आणि परिणाम म्हणजे काल ही दुसरी दोन कारणे होत.

**असाधक**-वि., **अपरिणामकरम्, अकार्यकरम्** (चवि. ८.६५)
परिणाम न करणारे, कार्य न करणारे.
**यद्वाक्येन हेतुरहितेन वाक्यविषयस्य सिद्धिर्न भवति तत्।** (चवि. ८.६७)
हेतुरहित अशा ज्या वाक्याने वाक्यातील विषयाची सिद्धि होत नाही ते असाधक वाक्य.

**असाध्य**-वि., **न विद्यते साधनं यस्य.** (चसू. १.६३)
न., **न अनुपक्रमम्, तद्याप्यमनुपक्रममिति कृत्वा द्विविधम्।** (असंसू. २ चसू. १०.९)
**"प्रत्याख्येय" इत्यस्य पर्यायः स च विशेषेणानुपक्रमे व्याधौ प्रयुज्यते।** (चसू. १०.१९)
जे बरे होण्याला साधन-उपाय नाही ते, बरे न होणारे. बरे होण्याच्या मर्यादेबाहेर गेलेले. याचे दोन प्रकार-याप्य व अनुपक्रम्य. पथ्य, औषध आहे तोंवर बरे. औषध नसले अपथ्य झाले की पुन्हा त्रासदायक ते याप्य. ज्याला उपाय-उपचार-उपक्रम नाही ते अनुपक्रम याला प्रत्याख्येय हा दुसरा पर्याय शब्द आहे.

**असाध्वीक्षित**-न., **अमंगलदृष्टिः** (कासू. १९)
अशुभ दृष्टि, वाईट दृष्टि.

**असामन्**-न., **विस्वरः, उच्चस्वरः** (चनि. ८.८) (चइं. ८.१९)
विकृत स्वर, उंच स्वर, मोठा स्वर.

**असार**-वि., **अभ्यन्तरसारवर्जितम्** (सुसू. २९.१२)
गर नसलेले, गाभा नसलेले, पोकळ.
**विशुद्धतरधातुविहीनः, सारशब्देन विशुद्धतरो धातुरुच्यते** (चवि. ८.११४)
सार म्हणजे विशुद्ध तर-अतिशुद्ध-उत्तम दर्जाचा धातु; असार म्हणजे हीन दर्जाचा धातु असलेला.
**यंत्रदोष० अशुद्धलोहादिघटितं, तनु दुर्बलम्०** (सुसू. ७.१९)
न., **वनस्पति० काष्ठागरु, अगरुविशेषः** (रा. १२.४२)
यंत्रातील एक दोष. अशुद्ध धातूचे-लोखंडाचे-बनविलेले बारीक किंवा असमर्थ बनविलेले (यंत्र). तकलुपी तकलादी, बनविलेले यंत्र.

**असित**-वि., **ईषत् कृष्णम्।** (सुउ. ४१.२५)
थोडे काळे; काळसर.
**कृष्णवर्णम्** (सुनि. १०.४) काळे.
पु., **मूषिकः अस्य विषेण रक्तच्छर्दिः जायते।** (अष्टांगसंउ. ४.४६ पृ. ३७४) एक प्रकारचा उंदीर; याच्या विषाने रक्ताची उलटी होते.
पु., **वनस्पति०, मुद्गः** (ध. ६.८१)
एक वनस्पती. मूग.
**ऋषि० रोगापहरणचिंतनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः** (चसू. १.८)
एक ऋषि. रोगनाशक उपायांच्या विचारविनिमयाकरितां हिमालयाच्या उतरणीवर जमलेल्या ऋषींपैकी एक.

**असिता**-स्त्री., **वनस्पति० पिप्पली.** (चचि. १९.१०७)
एक वनस्पती; पिंपळी.
**आग्नेयलूतविशेषः, इयं स्वेदजा तथा पित्तविकारकारिणी, तस्याः दंशो विड्गन्धिः कृष्णक्लेदशोफयुक्तो भवति तथा कृष्णः दुष्टरक्तस्रावश्च।** (असंउ. ४४,४५ पृ. ३६२,३७१)
उष्ण प्रकृतीचा एक किडा. हा उष्णतेने घामापासून उत्पन्न होणारा, पित्ताचे विकार करणारा. ह्याच्या दंशाच्या जागेला विष्ठेसारखा दुर्गंध येतो, काळी ओलसर सूज व पाण्यासारखा स्राव असतो. काळे दुष्ट रक्त स्रवते.

**-घन**-न., **खनिजधातु०, कृष्णाभ्रकम्** (र. २७.३७)
खाणीतला एक धातु. काळे अभ्रक.
**राजीसिरासंतत, वि. असिता नाम कृष्णा राज्यः सिराश्च ताभिः संततं व्याप्तम्।** (चचि. १३.२५)
काळ्या रेषा व शिरा यांनी भरलेली त्वचा.

**-सर्षप**-पु., **धान्य० रक्तसर्षपः**
**सिद्धार्थकवत् अस्य गुणाः**
**"पाके रसे चापि कटुः प्रदिष्टः।**
**सिद्धार्थकः शोणितपित्तकोपि॥**
**तीक्ष्णोष्णरूक्षः कफमारुतघ्न-**
**स्तथा गुणश्चासितसर्षपोऽपि॥"** (सुसू. ४६.४९)
एक धान्य, लाल मोहरी. गुण-तिखट रस व पचनानंतर ही तिखट. कफवातनाशक, पित्तवर्धक, रक्तदुष्टि करणारी. तीक्ष्ण, उष्ण, रूक्ष आहे.

**-सोम**-पु., **वनस्पति० सोमलता.** (र. ३०.४८)
सोमलता.

**-(असित-असिता)-असितांजनी, स्त्री., वनस्पति. कालाञ्जनी** (रा. परि. ४.४३)
मळ, आम, कृमि काढून टाकणारी वनस्पती.

**–असितानन**–पु., वनस्पति० बिल्व. ( ध. १.१०७ )
बेल.
**–असितालु**–पु., वनस्पति० नीलालुः ( रा. ७.३२ )
काळा आळू.
**असितोत्पल**–न., वनस्पति० नीलोत्पलं कृष्णोत्पलमित्यर्थः । ( चशा. ८.२४ रा. १०.२४८ )
निळे कमळ, काळे कमळ.
**असिपत्र**–पु., वनस्पति० इक्षु. ( रा. १४.१८० ) ऊस
**असिशिंबि ( बी )**–स्त्री., वनस्पति० तद्गुणाः । मधुरा, कषाया, शीतला, रुचिदायिनी, श्लेष्मपित्तजित्, व्रणदोषघ्नी । ( रा. ७.९७ )
तरवारीसारखी मोठ्या आकाराची गोड,तुरट, थंड, कफपित्तनाशक, व्रण दोष नाशक, रुचिदायक शेंग.
**असु**–पु., प्राणाः ( चइ. ११.२४ ) प्राण. जीव.
जीवितम् ( अहसू. ७.४२ ) आयुष्य, जगणे.
**–क्षय**–लक्षण० प्राणक्षयः ( चइं. ११.२४ )
मृत्युः ( सुसू. १.४१ )
हे एक लक्षण. जीवनशक्तीचा क्षय. मृत्यु.
**असुर**–पु., भूताधिपति. ( असंउ. ७ पृष्ठ ५९ )
आक्रमक रोगकर सूक्ष्म जीवांचा एक अधिपति-मुख्य.
भैषज्य० बिडलवण, अर्क ( र. ११.९१ )
एक औषध, बिडलवण, रुई.
**असूयक**–वि., परोत्कर्षासहिष्णुः परगुणमत्सरी असुरकायस्य लक्षणमेतत् ( सुशा. ४.८८ )
दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न होणारा. दुसऱ्याच्या गुणांचा मत्सर, हेवा करणारा. आसुर प्रकृतीचे एक लक्षण.
**असूयन**–न., द्वेषबुद्धिः अपरिपूर्णता इति इंदुः ( असंनि. ५.२७ ) द्वेष करणारी बुद्धि.
**असूया**–स्त्री.,– गुणेषु दोषारोपणम् । ( सुशा. ४.९१ )
दुसऱ्याच्या गुणावर दोषांचा आरोप करण्याची वृत्ति–खोड.
नागकेसरम् ( र. १७.६६ )
नागकेशर.
**( असृक् )-क्षय** पु., लक्षण० रक्तक्षयः । ( चचि. १६.३३ )
एक लक्षण, रक्तक्षय.
**–पित्त**–न., रोग० रक्तपित्तम् । ( अहसू. ५.३३ )
एक रोग. शरिरात व शरिराबाहेर रक्तस्राव होणे.
**–प्रक्लेद**–पु.,लक्षण० अस्रावस्रवणम् । ( असंचि. २० )
एक लक्षण. रक्तस्राव.

**–संपद्**–स्त्री., आर्तवस्य सुष्टुभावः शुद्धार्तवमित्यर्थः ( चशा. २.६ )
आर्तवाचे योग्य गुण. शुद्ध आर्तव. शुद्ध रज–मासिक.
**–स्रावण**–वि., रक्तस्रावकरः ( सुनि. १.१८ )
रक्तस्राव करणारा.
न., पंचकर्म० रक्तविस्रावणं, रक्तमोक्षणम् ( असंसू. २४–४६ )
एक उपचार. पंचकर्मापैकीं एक. रक्तस्राव करणे. जळु, शिंग, तुंबडी, शीर तोडून रक्त काढणे.
**( असृग् )-दर**–पु., स्त्रीरोग० असृग् रजः दीर्यते अस्मिन् इति असृग्दरः–प्रदरः–रक्तप्रदरः ( चचि. ३०–८७ ) ( सुशा. २.१८ )
स्त्रियांचा एक रोग. असृग् म्हणजे रज, दीर्यते–स्रवते ज्या विकारात तो. अधिक रजस्राव होणे. प्रदर, रक्तप्रदरही म्हणतात.
**–धरा**–स्त्री., षट्त्वक्षु द्वितीया ( चशा. ७.४ ) सुश्रुते लोहिता नाम्नाऽस्या निर्देशः ( सुशा. ४.४ )
चरकाने सांगितलेल्या सहा त्वचांपैकी दुसरी. सुश्रुतात हिला लोहिता म्हटले आहे.
**असृगर्बुद**–न., गुह्यरोगः ( अहउ ३३.२४ )
लक्षणम्–अस्मिन् रोगे शिश्ने सरागासितस्फोटानां पिटिकानां चोत्पत्तिर्भवति तीव्रा च वेदना । सुश्रुतेऽयं रोगो रक्तार्बुदनाम्ना शूकदोषेषु लिखितः ( सुनि. १४.१३ )
जननेंद्रियाचा विकार.
लक्षण–जननेंद्रियावर लालकाळसर फोड, पुळ्या होतात. तीव्र वेदना असतात. सुश्रुतात हा रोग रक्तार्बुद नावाने शूक दोष प्रकरणात दिला आहे.
**असृगामय**–पु., लक्षणम् रक्तष्ठीवनम् ( सुउ. ४१.१५ )
लक्षण. घशातून रक्त येणे. रक्ताची थुंकी, रक्ताचा खाकरा.
**असृग्वहा**–वि., समा, गूढा, स्निग्धा, शुद्धरक्तवहा सिरा ( असंशा. ६ )
सिराप्रकारः ( सुशा. ७.१८ )
शुद्ध रक्त वाहणारी, वरून न दिसणारी सम व स्निग्ध शीर. शिरांचा एक प्रकार.
**असृज्**–न., शारीरधातु० रक्तधातुः ( चसू. १.६८ )
शरिरातील एक धातु.
स्त्रीशोणितम्, आर्तवमित्यर्थः ( सुनि. ९.२७ )
स्त्रीचे मासिक रज. महिन्याचा रक्तस्राव–विटाळ.
वनस्पति० कुंकुमम्. ( ध. ३.१२ ) केशर.

स्त्री., वनस्पति० स्पृक्का. ( घ. ३.६२ )
प्रमेह, मूतखडा नाशक, दुर्गंध नाशक, सुगंधी वनस्पती.

**अस्कन्दमान**—वि., अस्त्यानम् ( सुसू. १४.४१ )
न गोठणारे. न साकळणारे. न थिजणारे.

**अस्कन्दिन्**—वि., स्त्यानत्वरहितम् ( सुसू. १४.२१ )
न गोठणारे, न साकळणारे, न थिजणारे.

**अस्कन्न**—वि., अस्त्यानम् ( अहृउ. ३६.५२ )
न गोठणारे, न साकळणारे, न थिजणारे.

**अस्त**—न., रहितम्, गतम् ( सुसू. ४४.५ )
रहित. शेवट. शेवटास जाणे. मावळणे.

**—दोष**—वि., दोषरहितम् ( सुसू. ४४.५ )
दोषरहित, निर्दोष. दोष नसलेले.

**—पलित**—वि., लक्षण० पलितरोगवर्जितः ।
( अहृसू. २०.३९ )
एक लक्षण. पलित रोग गेलेला. पलित रोग नसलेला. पलित—पिकलेले ( केस ) पांढरे केस नसलेला.

**अस्थानहासिन्**—वि., लक्षण० कालेऽप्रसङ्गे हसतीत्यस्थानहासिन् । ( असंसू. ८ )
अस्थानी हसणारा. अवेळी हसणारा; प्रसंग वेळ न पाहता हसणारा.

**अस्थायित्व**—न., अस्थिरत्वम्, अनवस्थितत्वम्
( सुसू. १५.३७ )
स्थिर नसणे. एके ठिकाणी न राहाणे, चंचल, अव्यवस्थितपणा, अनिश्चितपणा.

**अस्थि**—न., शारीरधातु० रसादिसप्तधातुष्वेकः ।
( अहृसू. १.१३ )
देहे शरीरधारकः कठिनतमः सारो धातुः
( सुसू. ४.५ ( सुशा. ५.१८ )
अस्थ्नो जनिः ( उत्पत्तिः ) स्वोष्मणः कृतः पृथिव्यग्न्यनिलादीनां संघातः खरत्वं प्रकरोति । ततोऽस्य नृणामस्थि जायते । अस्थ्नां मध्ये समीरणः सौषिर्यं करोति । ( चचि. १५.३०.३१ )
अस्थ्यपि द्रवरूपमस्त्येव स्रोतोवाह्यमिति कृत्वा ( चक्र. चचि. ५.८ ) उत्पत्तिकालः सुश्रुतमतेन रसोत्पत्त्यनन्तरं विंशतितमे दिनेऽस्थि धातुर्भवति ।
( डसुसू. १४.१४ )
पराशरमते—षष्ठे दिनेऽस्थि जायते.
( चक्र. चचि. १५.३१ )
अस्थीनि देहधारणं मज्ज्ञः पुष्टिं च कुर्वन्ति
( सुसू. १५.४ ( १ )

तत्स्वरूपम्—कठिनं स्थिरम् ( अहृशा. ३.५ )
मज्जपूर्णं सुषिरम् ( का. शा. )
अस्थिसाराणां लक्षणम्—पार्ष्णिगुल्फजान्वरत्निजत्रुचिबुकशिरःपर्वस्थूलाः स्थूलास्थिनखदन्ताश्च अस्थिसाराः । ते महोत्साहाः क्रियावन्तः क्लेशसहाः सारस्थिरशरीरा आयुष्मन्तश्च भवन्ति
( चवि. ८.१०९ )
महाशिरःस्कन्धदृढदंतहन्वस्थिनखास्थिभिरन्विताः ।
( सुसू. ३५.१६ )
दोषसंबन्धः—तत्रास्थनि स्थितो वायुः
( अहृसू. ११.२६ )
अस्थिमानं निर्दिष्टमागमे । स्वनामविशेषात् पञ्चप्रकाराण्यस्थीनि । तद्यथा—कपालरुचकतरुणवलयनलकानि । ( सुशा. ५.२० )
देहोर्ध्वताधारणं मज्ज्ञः पोषणं च तस्य कर्म
( असंसू. १९ )
शरीरिणां त्वङ्मांसेषु तस्माच्चिरविनष्टेष्वस्थीनि न विनश्यन्ति यत एतानि देहिनां साराणि । अत्र सिराभिः स्नायुभिश्च निबद्धानि मांसान्यस्थीन्यालम्बनं कृत्वा न शीर्यन्ते न पतन्ति च ।
( सुशा. ५.२१ )
तस्योपधातुः—दन्ताः ( शार्ङ्ग ) नखरोमाण्यस्थ्नां मलः 'स्यात् किट्टं केशलोमास्थ्नाम्' ( चचि. १५.१९)
क्षीणमस्थिदन्तनखरोमकेशशातनरौक्ष्यपारुष्यसंधिशैथिल्यास्थितोदास्थिबद्धमांसाभिलाषैर्देहं पीडयति । ( असंसू. १९ )
वृद्धमस्थि अध्यस्थिभिरधिदन्तैश्च देहं पीडयति
( असंसू. १९ )
चिकित्सा—अस्थिसमानगुणः समानगुणभूयिष्ठो वाऽऽहारः ( चशा. ६.९ )
यथा—मज्जास्थिस्नेहसंयुतानि मांसानि
( डसुसू. १५.२९ )
तरुणास्थीनि ( चशा. ६.१० )
क्षीरबस्तयश्च ( असंसू. १९ )
अस्थिसंख्या:—त्रीणि सषष्टीन्यस्थिशतानि वेदवादिनो भाषन्ते
शल्यतन्त्रेषु तु त्रीण्येव शतानि । तेषां सविंशमस्थिशतं शाखासु सप्तदशोत्तरं शतं श्रोणिपार्श्वपृष्ठोरःसु ग्रीवां प्रत्यूर्ध्वं त्रिषष्टिः एवमस्थ्नां त्रीणि शतानि पूर्यन्ते । एकैकस्यां तु पादाङ्गुल्यां त्रीणि त्रीणि तानि

पञ्चदश, तलकूर्चगुल्फसंश्रितानि दश, पार्ष्ण्यामेकं, जङ्घायां द्वे, जानुन्येकम्, एकमूराविति त्रिंशदेवमेकस्मिन् सक्थ्नि भवन्ति, एतेनेतरसक्थिबाहू च व्याख्यातौ, श्रोण्यां पञ्च; तेषां गुदभगनितम्बेषु चत्वारि, त्रिकसंश्रितमेकं, पार्श्वे षट्त्रिंशदेकस्मिन्, द्वितीयेऽप्येवं पृष्ठे त्रिंशत्, अष्टावुरसि द्वे अंसफलके ग्रीवायां नव, कण्ठनाड्यां चत्वारि, द्वे हन्वोः, दन्ता द्वात्रिंशत्, नासायां त्रीणि, एकं तालुनि, गण्डकर्णशङ्खेष्वेकैकं, षट् शिरसीति । एतानि पञ्चविधानि भवन्ति; तद्यथा, कपालरुचकतरुणवलयनलकसंज्ञानि । तेषां जानुनितम्बांसगण्डतालुशङ्खशिरःसु कपालानि, दशनास्तु रुचकानि घ्राणकर्णग्रीवाक्षिकोषेषु तरुणानि पार्श्वपृष्ठोरःसु वलयानि, शेषाणि नलकसंज्ञानि(सुशा. ५.१८–२०) शरिरांतील रस इत्यादी सात धातूंपैकी एक धातु. शरिराचे धारण करणारा सर्वात कठिण धातु.

पृथिवी, अग्नि, वायु इत्यादिकांचे एकत्र पचन, होऊन खरत्व, कठिणत्व निर्माण होते. खर म्हणजे कठिण घटक निर्माण होतात व नंतर अस्थि उत्पन्न होतात. अस्थींमध्ये वायु पोकळी-सच्छिद्रता निर्माण करतो. स्रोतसातून वाहणारा द्रवरूपही अस्थि शरिरांत आहे. पोषक सूक्ष्म अस्थिघटक रसवाहिनीतून अस्थिवह स्रोतसांत जातात व त्यातून वाहत असतानां अस्थींचे पोषण करतात. आहारापासून रसाची उत्पत्ति झाल्यानंतर विसाव्या दिवशी अस्थि धातूची उत्पत्ति होते हे सुश्रुत मत आहे. पराशर मते सहाव्या दिवशी अस्थि धातु होतो. **कार्य**–देहाचे धारण व मज्जेचे पोषण करणे **स्वरूप**–कठिण, स्थिर, सच्छिद्र व पोकळ आणि मज्जेने भरलेले.

१–शारीरलक्षणे–**अस्थिसारपुरुषलक्षणे** मोठे डोके व खांदे, टाच, घोटा, गुडघा, कोपर, खांद्याचा सांधा, हनुवटी, डोके, पेरी, हाडे, नख दांत ही जाड व पक्के कणखर असतात.

२–मानसिक व इतर लक्षणे– अस्थिसार व्यक्ति फार मोठ्या उत्साही, कष्टाळू, क्लेश सहन करणाऱ्या, सतत काम करणाऱ्या, आयुष्यमान् असतात. सुखादुःखाचे परिणाम त्यांच्या शरिरावर होत नाहीत. कृश असतील तर लगेच पुष्ट होत नाहीत किंवा पुष्ट असतील तर लगेच कृश होत नाहीत. कारण त्यांचे शरीर स्थिर असते व भरीव असते.

दोषसंबंध–अस्थीमध्ये वायु असतो.

**प्रकार**–रचनेला अनुसरून पांच प्रकार १–खापरासारखे ते कपाल २–दात रुचक ३–कान नाक इत्यादीतील अस्थि तरुण ४–फांसळ्यासारखे ते वलय ५–व हातपायांसारख्या अवयवांतील नळ्या हे नलक अस्थि.

**कर्म**– शरिराला उभ्या अवस्थेत ठेवणे व मज्जेचे पोषण. शरिराचे त्वचा मांस नष्ट झाले तरी दीर्घकालानंतर ही हाडे राहतातच. नष्ट होत नाहीत. म्हणूनच ते शरीराचे सार होत. आधारभूत हाडांवर शिरांनी व स्नायूंनी मांस बांधलेले असते. हाडांचा आधार असल्याने ते विरत नाही व पडतही नाही. **उपधातु**–शार्ङ्गधर दात हे हाडांचा उपधातु मानतात. **मळ**–नख केश हे अस्थींचे मळ होत. **अस्थिक्षीणता झाल्यास**–दात, नख, लव, केश गळतात. त्वचेवर रूक्षता व खरखरीतपणा येतो. सांधे ढिले होतात, हाडात टोचल्यासारख्या वेदना व अस्थीला चिकटलेले मांस खाण्याची इच्छा होते. **अस्थिवृद्धि झाल्यास**–हाडावर हाडे व दातावर दात वाढतात. **उपचार**–अस्थींच्या समान गुणाचा किंवा समानगुण भूयिष्ठ असा आहार द्यावा; जसे–मज्जा, कोवळीं हाडे व स्नेहयुक्त मांस, कडुरसाने सिद्ध दूध तूप, क्षीरबस्ति, तुपाचा बस्ति. **संख्या**–कायचिकित्सक ३६० व शल्यचिकित्सक ३०० अस्थि समजतात. शाखेत १२०, फासळ्या, पाठ व उर यात ११७ मानेत ६३ अशी ३०० संख्या. एकेका पायाच्या अंगुळीत तीन तीन अशीं १५, तळपाय, घोटा यांत १०, टाचेत १ पोटरीत दोन, गुडघ्यात एक, मांडीत एक अशी तीस एका टांगेत. इतर टांग व हातात तीस तीस हाडे. कंबरेत पांच, पैकी त्रिकात एक व गुद, ढुंगण व योनि भाग यात चार. छातीच्या एका बाजूस छत्तीस, दुसऱ्या बाजूस छत्तीस, पाठीत तीस, उरात आठ, असंफलक दोन मानेत नऊ, गळ्यात चार, हनुवटीत दोन, बत्तीस दात, नाकात तीन, टाळूत एक, गण्ड, कर्ण, शंखात एकेक, व डोक्यात सहा. प्रकारानुरूप गुडघे, नितंब, अंस, गाल, टाळू. शंख व डोके यात खापरासारखी, दात रुचक. नाक, कान, मान, डोळ्याची खोवण, यात तरुण. फासळ्या पाठ व ऊर यात वलय, व बाकी नलक.

## अस्थिसंख्यातुलनाकोष्ठकम्

| अस्थिनाम | चरक | सुश्रुत | अ. संग्रह | काश्यप. |
|---|---|---|---|---|
| नखाः | २० | — | २० | |
| पाणिपादशलाकाः | २० | पाणिपादतला-स्थीनि १६ | २० | |
| पाणिपादाङ्गुल्यस्थीनि | ६० | ६० | ६० | |
| पाणिपादशलाकाधिष्ठानानि | ४ | — | शलाकाबंधनम् ४ | |
| पादगुल्फाः | ४ | २ | २ | |
| पादकूर्चास्थीनि | — | १० | ४ | |
| हस्तकूर्चास्थि | — | मणिबन्धास्थि | — | |
| पार्ष्ण्यस्थिनी | २ | २ | २ | |
| मणिकौ | २ | — | — | |
| अरत्न्यस्थीनि | ४ | प्रकोष्ठास्थीनि ४ | ४ | |
| जङ्घास्थीनि | ४ | ४ | ४ | |
| जान्वस्थिनी | २ | २ | २ | |
| जानुकपालिके | २ | — | — | |
| ऊरुनलके ( ऊर्वस्थि कूर्परम् ) | २ | २ | २ | |
| बाहुनलके ( बाह्वस्थि ) | २ | २ | २ | |
| श्रोणिफलके | २ | — | — | |
| भगास्थि | १ | १ | १ | |
| नितम्बास्थिनी | — | २ | २ | |
| गुदास्थि | — | १ | — | |
| त्रिकसंश्रितम् | — | १ | १ | |
| पर्शुकाः | २४ | पार्श्वास्थीनि ७४ | २४ | |
| स्थालकास्थीनि | २४ | | २४ | |
| स्थालकार्बुदानि | २४ | | २४ | |
| अंसौ | २ | — | २ | |
| अंसफलके | २ | २ | २ | |
| अक्षकास्थिनी | २ | २ | २ | |
| जत्रु | १ | — | २ | |
| उरोस्थीनि | १४ | ६ | ८ | |
| पृष्ठगतास्थीनि | ४५ | ३० | ३० | |
| ग्रीवागतास्थीनि | १५ | ९ | १३ | |
| कण्ठनाडीगतास्थीनि | — | ४ | ४ | |
| हन्वस्थि | १ | २ | २ | |
| हनुमूलबन्धनास्थिनी | २ | | | |

## अस्थिसंख्यातुलनाकोष्टकम्

| अस्थिनाम | चरक | सुश्रुत | अ. संग्रह | काश्यप. |
|---|---|---|---|---|
| नासिकागण्डकूटललाटास्थि | १ | — | — | |
| नासास्थीनि | — | ३ | ३ | |
| गण्डास्थिनी | — | २ | २ | |
| कर्णास्थिनी | — | २ | २ | |
| शङ्खास्थिनी | २ | २ | २ | |
| तालुकास्थिनी | २ | १ | २ | |
| दंताः | ३२ | ३२ | ३२ | |
| दन्तोलूखलाः | ३२ | — | ३२ | |
| शिरःकपालास्थीनि | ४ | ६ | ६ | |
| सम्पूर्णसंख्या | ३६० | ३८६ | | ३४८ |

**फलबीजम्, कुलकम्** ( चचि. १ (१.४७ )
फळातील आठळी.

**इदमाहारौषधार्थे प्रयुक्तं द्रव्यम्** ( चसू. १.६९ )
आहार व औषध यात उपयोगात आणलेले हे द्रव्य.

**शिखिबर्हिबलाकास्थ्नां धूमो विषनुत्**
( चचि. २३.९८ )
मोर, कोंबडा, बगळे यांच्या हाडांचा धूर विष नष्ट करतो.

**अस्थिक्षये तरुणास्थि ।** ( चशा. ६.१० )
अस्थिक्षयात तरुण-कोवळी हाडे उपयुक्त.

**—क्षत**—न., **लक्षण० अस्थनि जातं क्षतम् ।**
( सुसू. २३.८ ) हाडात झालेले क्षत. जखम.

**—गत**—वि., **अस्थिमध्यान्तराले प्रविष्टम्**
( सुसू. २६.१० ) हाडामध्ये आत शिरलेले.

**—ग्रन्थि**—पु., **रोग० अस्थिजो ग्रन्थिः, अस्थिभङ्गाभिघाताभ्यामुन्नतावनतं तु यत् अस्थि सोऽस्थिग्रन्थिः**
( असंउ. ३४ )
हाडाची गाठ. हाडभंगले, हाडावर आघात झाला तर हाडाचा काही भाग दबतो, काही उंचावतो. हा हाडाचा उंचवट्याचा भाग अस्थिग्रंथी होय.

**—च्छलित**—न., **रोग० अस्थिच्छल्लमिव विद्यते यस्मिँस्तत् । अस्थिकाण्डभग्नस्य प्रकारः**
फुटलेल्या हाडातील एक तुकडा दबणे व एक उंचावणे.

**लक्षणम्—यत्पार्श्वयोरस्थिहीनोद्गतं तद् ।**
( डसुनि. १५.१० )
**पार्श्वगतस्तोकाऽस्थिविश्लेषाद्भवति (मा) ।**

**लक्षण**—बाजूला हाडाचा एकभाग दबतो व एक उंचावतो. हाडाच्या पृष्ठभागावरचा थोडा भाग हाडापासून सुटतो, झाडाच्या वेगळया झालेल्या सालीसारखा असतो तो. किंवा ओली काडी मोडल्याप्रमाणे असतो तो.

**—च्छल्लिक**—न., **रोग० अस्थिच्छलिम्**
( डसुनि. १५.१० ) पहा 'च्छलित'

**—( च्छल्लिका )**—स्त्री., **रोग० अस्थिच्छलितम्**
( असंउ. ३२ पृ. २३६ ) पहा 'च्छलित'

**—च्छलित**—न., **रोग० अस्थिच्छलितम् ।**
( सुनि. १५.८ ) पहा 'च्छलित'

**—जाल**—न., **शरीरस्थरचना० अस्थिकृतजालम् अस्थिजालानि चत्वारि, एकैकस्मिन्मणिबन्धे गुल्फे च ।**
( सुशा. ५.१२ )
शरिरातील रचनेचा विशेष, हाडांचे जाळे, समुदाय. प्रत्येक मनगटात व घोट्यात अशी चार जाळी.

**—तोद**—पु., **लक्षण० अस्थनि सूचिविद्धवद्वेदना**
( सुसू. २४.९ अहृसू. ११.१९ )
एक लक्षण. हाडात सुया टोचल्याप्रमाणे होणारी वेदना

**—दोषज**—वि., **अस्थिदोषोद्भवम् ।** ( सुसू. २४.९ )
हाडातील दोषापासून झालेले.

**—दोषजव्याधि**—पु., **रोग० अस्थिदोषेण जनितो व्याधिः स च अध्यस्थिः, अधिदन्तः, दन्तभेदः,**

**अस्थिभेदः, अस्थिशूलम्, विवर्णता, केशलोमनखश्मश्रुदोषाश्च ।** ( चसू. २८.१६ )
**कुनखप्रभृतयः अस्थिदोषजाः** ( सुसू. २४.९ )
एक रोग. अस्थिमधील दोषाने झालेले रोग. हाडावर हाड, दातावर दात फुटणे, हाड फुटणे, हाडातील शूळ, वर्ण बिघडणे, केस, लव, नख, दाढी, मिशी यांची विकृति, व नखविकृति या अस्थिदोषांपासून होतात.

**–नेत्र**–न., यन्त्र० **अस्थ्नां कृतं बस्तिनेत्रम्** ( चसि. ३.७ )
बस्तियंत्राचा एक भाग. बस्तीला लावलेली गुदात घालावयासाठी केलेली हाडाची नळी.

**–पञ्जर**–पु., **कङ्कालः** ( काफक्कचि. )
हाडाचा पिंजरा; हाडाचा सापळा.

**–पर्व**–न., **अस्थिसंधिः** ( सुनि. १.३९ )
हाडाचे पेर, हाडाचा संधि.

**–प्रदोषजव्याधि**–पु., **रोग० अस्थिदोषजव्याधिः** ( चसू. २८.१६ ) हाडातील दोषामुळे झालेला रोग.

**–भङ्ग**–पु., **रोग० अस्थिसन्धानभग्नता, अस्थ्नां भङ्गः, भग्नं वा; तद्द्विविधं; सन्धिमुक्तं, काण्डभग्नं च ।** ( सुनि. १५.३–४ )
एक रोग, हाडाचा भंग, हाडाच्या सांध्यात मोडणे किंवा हाडाच्या अंगात मोडणे; याचे दोन प्रकार; संधीतून हाड निखळणे व हाड मध्येच मोडणे.

**–भेद**–पु., **व्याधिलक्षण० अस्थीनि भिद्यन्ते इव यस्यां सा वेदना ।** ( चनि. ८.६ )
एक लक्षण. हाडे फुटल्याप्रमाणे वेदना.
**अस्थ्नः भेदः अस्थिभङ्गः ।** ( चचि. २५.३२ )
हाडाचा भंग. हाड फुटणे.

**–मध्यमज्जन्**–पु., **अस्थ्नः मध्यभागे स्थितो मज्जधातुः** ( चचि. १५.२६ )
अस्थीच्या मध्ये असलेला मज्जाधातु.

**–मर्मन्**–न., **मर्मभेद० अष्टावस्थिमर्माणि** ( सुशा. ६.४ )
**यस्य मर्मणो लक्षणानि च. सन्निपातेऽस्थिबाहुल्यं बाहुल्येनास्थिजनितानि द्वे कटीकतरुणे, द्वौ नितम्बौ द्वे अंसफलके द्वौ शङ्खौ च इत्येवमष्टौ ।** ( डसुशा. ६.७ असंशा. ७.२९ )
मर्मांचा प्रकार. वर्ग. आठ अस्थिमर्मे. ज्या मर्मांच्या लक्षणात अस्थिविकृतीची लक्षणे दिसतात तें.

**–वहस्रोतस्**–न., **अस्थिवहानां स्रोतसां मेदोमूलम्** ( चवि. ५.८ ) **अस्थिवहनार्थं स्रोतः** ( चवि. ५.८ )
**तस्य दुष्टिहेतुः–अतिव्यायामादतिसंक्षोभादस्थ्नामतिविघट्टनाद्वातलानां च सेवनादस्थिवाहीनि स्रोतांसि दुष्यन्ति ।** ( चवि. ५.१७ )
**तत्कृतरोगाः–अध्यस्थ्यधिदन्तौ दन्तास्थि भेदशूलौ विवर्णता केशलोमनखश्मश्रुदोषाश्च भवन्ति ।** ( चसू. २८.१६ )
**( सुश्रुतसंहितायामस्थिवहानां स्रोतसां नोल्लेखः )**
अस्थीचे परिपोषक अस्थिघटक ज्या स्रोतसातून बाहुल्याने वाहतात ती. अस्थिवहनाकरिता असलेले स्रोतस. त्याचे मूल मेद. त्यांच्या दुष्टीची कारणे–अतिव्यायामामुळे अंगाला धक्के बसल्याने, हाडे खिळखिळी होण्याने, हाडे अगदी आवळून बांधल्यामुळे, वातुळ पदार्थांच्या सेवनामुळे, अस्थिवह स्रोतसे दुष्ट होतात. होणारे रोग–हाडावर हाड व दातावर दात, दात व हाडे यात फूट व शूळ, वर्ण बिघडणे, नख, केश, लव, दाढी, मिशी, यात विकृति. ( सुश्रुतात याचा उल्लेख नाही. )

**–विदष्ट**–वि., **अस्थन्यत्यासक्तम्** ( सुसू. २७.१४ )
हाडात अतिशय रुतलेले, फार खोल गेलेले.

**–विद्ध**–वि., **रोग०, अस्थन्यभिताडितः; लक्षणम्–निशादिनेषु घोरा रुजः सर्वास्ववस्थास्वशान्तिस्तृष्णाऽङ्गसादः श्वयथू रुक् च ।** ( सुसू. २५.३९ )
एक रोग. हाड फुटले तर रात्रंदिवस घोर वेदना, सर्व अवस्थात बेचैनी, तहान, अंग गळणे, सूज व वेदना.

**–विमुक्त**–वि., **बीजरहितम् ।** ( सुसू. ४४.६२ )
आठळी रहित, बी काढलेले.

**–विवर**–न., **अस्थिच्छिद्रम् ।** ( सुसू. २७.२४ )
हाडाची पोकळी

**–विष**–न., विष०, **'विषहतास्थि सर्पकण्टकवरटीमत्स्यास्थि चेत्यस्थिविषाणि'** ( सुक. ३.५ )
एक विष. विषाने दूषित झालेले हाड, सर्पाचे हाड, गांधील माशी, माशाचे हाड इत्यादी अस्थिविषे.

**–शल्य**–न., शल्य०, **अस्थिरूपं शल्यम्; अन्नेन सहाभ्यवहृतमस्थिशल्यं यदा गुदेऽसम्यगागतं भवति तदा शरीरबाधाकरं भवति** ( सुनि., ४.९ ) **मत्स्यकण्टकमन्यद्वाऽस्थिशल्यं कण्ठेऽवलग्नं सूत्रेण सूत्रप्लोतेन वा वेष्टितयाऽङ्गुल्याऽपहरेत् ।** ( असंसू. ३७.१२ )

एक शल्य. हाडाच्या जातीची सलणारी वस्तु. अन्नाबरोबर गिळलेले शल्य–सल जेव्हा गुदाजवळ वेडे वाकडे येऊन तेथे थांबते तेव्हा ते शरिराला बाधक होते. माशाचा काटा, दुसरे हाडाचे शल्य, घशात अडकते तेव्हा दोरा किंवा कापूस बोटाला गुंडाळून त्या बोटाने काढावे.

**–शून्यता**–स्त्री., **रोगलक्षण०, रिक्तता, पूरणाभावात् । मज्जक्षयेऽल्पशुक्रता पर्वभेदोऽस्थिनिस्तोदोऽस्थिशून्यता च ।** ( सुसू. १५.९ )
एक रोग. लक्षण–अस्थींचे पूरण जो मज्जा धातु तो कमी झाल्यामुळे क्षीण झाल्यासुळे अस्थि–हाड रिकामे होते, त्याची पोकळी वाढते. अस्थि शून्य होतो; शिवाय शुक्र धातु अल्प होतो, पेरी फुटल्याप्रमाणे दुखतात व हाडात टोचणी ही लक्षणे होतात.

**–शूल**–न., **रोगलक्षण० मध्यममार्गजो रोगः**
( चसू. ११.४९ ) रोगाचे एक लक्षण.
मध्यम मार्गातील रोग.
**अस्थिविद्धवद् वेदना । अस्थिप्रदोषजविकारेष्वेकः**
( सुसू. २४.९ ) हाड फुटल्याप्रमाणे वेदना.
हाड दुष्ट झाल्यामुळे होणाऱ्या रोगांपैकी एक.
**लक्षण० मज्जास्थिकुपितानिलस्यैकं लक्षणम्–अस्थिपर्वणां भेदः सन्धिशूलं, मांसबलक्षयः संतता रुक् अस्वप्नश्च मज्जास्थिकुपितेऽनिले भवन्ति ।**
( चचि. २८.३३ )
एक लक्षण. मज्जा व अस्थि यात प्रकुपित झालेल्या वायूचे लक्षण. हाडाच्या पेऱ्यामध्ये फूट. संधिशूळ. मांसबलक्षय. सातत्याने अखंड वेदना. झोप थोडी किंवा मुळीच नसते. ही लक्षणे जोडीला असतात.

**–शोष**–पु., **लक्षण० अस्थिशोषम् अस्थिगतवातस्यैकं लक्षणम् ।** ( सुनि. १.२८ )
**अत्राऽऽस्थापनं प्रधानतमं चिकित्सितम्**
( चसि. २.१६ )
एक चिन्ह. हाड शुष्क होणे, सुकणे, क्षीण होणे. अस्थिगत वाताचे एक लक्षण. उपचार–मलहर व स्नेहबस्ति येथे प्राधान्याने उपयुक्त–सर्वोत्तम उपाय.

**–श्वेत**–वि., **अस्थिवत् श्वेतः ।** ( चइं. ८.१३ )
हाडाप्रमाणे पांढरा.

**–संघात**–पु., **अस्थिमेलनम् चतुर्दशाऽस्थ्नां संघाताः तेषां स्थानानि एकैको गुल्फजानुवंक्षणमणिबन्धकूर्परकक्षासु त्रिकशिरसोरेकैकः**
( सुशा. ५.१६ असंशा. ५.६६ )
हाडांचा मेळावा. हाडांचा समूह. हे चौदा आहेत. त्यांची स्थाने. प्रत्येक घोटा, गुडघा, जांघ, मनगट, कोपर, काख यात मिळून बारा. त्रिक व डोके यात एकेक. एकंदर चौदा.

**–सन्धि**–पु., **अस्थिमेलनस्थानम्–सन्धि**
( असंशा. ५.९५ )
हाडे एकमेकांशी जुळण्याचे स्थान. सांधा. संधि.

**–सम्बन्धन**–पु., वनस्पति० **प्रियङ्गुः** ( धनि. ६.९० )
एक वनस्पती. गव्हला.

**–स्राव**–पु., **रोग०** ( र. ३०–३०.६६ )
एक रोग. अस्थीमधील स्राव.

**अस्थ्याश्रय**–वि., **अस्थिसंश्रित ।** ( चसू. २८.२७ )
**अत्र भेषजं–पञ्चकर्माणि वमनविरेकनस्यादीनि तथा तिक्तोपहितक्षीरसर्पीषि च ।** ( चसू. २८.२७ )
हाडाचा आधार असलेला. हाडावर आधारलेला. हाडाच्या आश्रयाने असलेला.
उपचार–पंचकर्मे म्हणजे वांती, रेचक, नस्य इत्यादी. तसेच कडू द्रव्यांनी सिद्ध दूध, तूप.

**–सार**–पु., **अस्थिसारः शक्तिर्देहस्य श्रेष्ठो धातुर्वा यस्य सः ।** ( चवि. ८.१०७ )
**लक्षणम्–महाशिरःस्कन्धः दृढदन्तहन्वस्थिनखः ।**
( सुसू. ३५.१६ )
**गुणाः महोत्साहाः, क्रियावन्तः, क्लेशसहाः सारस्थिरशरीराः आयुष्मन्तश्च ।** ( चवि. ८.१.७ )
ज्याच्या शरिरात अस्थिधातू, विशुद्धतर–उत्तम दर्जाचा आहे असा. ज्याच्या शरिरात इतर धातूंच्या मानाने अस्थिधातू अधिक चांगल्या दर्जाचा–गुण कर्मांचा आहे असा. ज्याच्या शरिरात अस्थिधातू श्रेष्ठ आहे असा लक्षणः– डोके व खांदे मोठे असणे; दांत, नखे व हनुवटीचे हाड बळकट–पक्के असणे. गुण–असे लोक सदा मोठे उत्साही, कामात नित्य गर्क, कष्ट सहन करणारे, त्यांचे शरीर उत्तम गुणांचे–दर्जाचे असून आनंद दुःख, सुख, कष्ट यांच्यामुळे लगेच पुष्ट किंवा क्षीण न होणारे असते; व ते दीर्घायुषी असतात.
**अस्थिकंकाल, अस्थिपंजर** ( सुशा. ५.२१ )
हाडांचा पिंजरा. हाडांचा सापळा.
**मज्जा**–( रा. ६.३८२ )
मज्जाधातु. अस्थि धातूचे घटकांचे पचनाने त्यापासून

उत्तम दर्जाचा शरिराला उपयुक्त असा जो घटक निर्माण होतो तो मज्जाघटक. म्हणून तो अस्थीचा सार.

**–स्तम्भ**–पु., **लक्षणम्० अस्थिगतिविघातः** ( चसि. २.१६ )
एक लक्षण. हाडांची गति थांबणे. हाडांची हालचाल थांबणे. हाडे ताठरणे. जखडणे.

**अस्थिर**–वि., **चलम्** ( सुचि. २२.२९ )
हालते. स्थिर नसलेले, चंचल, चल.
**अकठिनम्** ( सुचि. ५.३२ ) कठीण नसलेले, मृदु.

**–जल**–न., **वहत्पानीयम्** । ( सुचि. ३.५६ )
वाहणारे पाणी. वाहते पाणी.

**अस्निग्ध**–वि., **ईषत्स्निग्धम्** । ( सुचि. ३७.४५ )
**न स्निग्धः–अस्निग्धस्य लक्षणानि-पुरीषं ग्रथितं, रूक्षं वायुः अप्रगुणः, पक्ता, मृदुः, गात्रस्य खरत्वं रौक्ष्यं च** ( चसू. १३.५७ )
थोडे स्निग्ध, स्निग्ध नसणे. रूक्ष. लक्षणे–पुरीष–मळ गाठाळलेला व रूक्ष. वात कार्य करीत नाही. अग्नि मंद. अवयव रूक्ष व खरखरीत

**–दारुक**–न., **वनस्पति० देवदारु** ( रा. १२.१०४ )
देवदार.

**अस्पर्शारि**–पु., **वनस्पति० धन्वयासः** ( र. २५.७६ )
एक वनस्पती. धमासा.

**अस्र**–पु., **कोण, धारा** ( र. २.५७ )
कोण–कोपरा. धार.
न., **शारीर धातु० रक्तम्** ( र. २०. १९७ )
शरिराचा धातू. रक्त.
**नयनजलम्** ( डसुक. ३.३५ )
डोळ्यातील पाणी. अश्रु. आसु.
**वनस्पति० कुंकुमम्** ( ध. ३.१२ ) एक वनस्पती. केशर.
**अस्रशब्दः स्राववाची ' आस्रावः** ( सुनि. १०.१२ )
स्राव. गळ. गळणे.

**–खदिर**–पु., **वनस्पति० खदिरः** ( रा. ८.३६ )
खैर. लाल काळसर खैर.

**–पवन**–न., **रोग० वातरक्तम्** ( अहृसू. १०.१३ )
एकरोग–वातरक्त. रक्तपिती.

**–बिन्दुच्छदा**–स्त्री., **वनस्पति० लक्ष्मणा** ( रापरि. ७.५६ )
एक वनस्पती. पांढरी रिंगणी. ही पुत्रदायक आहे.

**–मण्डल**–न., **रोग० लोहितमण्डलम्, रक्तदोषजरोगेष्वेकः** ( चसू. २८.१३ )
एक चिन्ह. एक रोग. रक्ताचे मंडल, रक्ताचे चकंदळ. तांबडे चकंदळ, रक्ताच्या दोषांपासून होणाऱ्या रोगांपैकी एक.

**–रोधिनी**–स्त्री., **वनस्पति० लज्जालु** ( रा. ५.१६० )
एक वनस्पती. लाजाळु.

**–वात**–पु., **रोग० वातरक्तम्** । ( र. २८.५२ )
एक रोग. वातरक्त. रक्तपिती.

**–विशोधन**–वि., **रक्तदुष्टिहरम्** । ( अहृसू. १०.२० )
रक्त शुद्ध करणे, रक्तातील दोष काढणे, रक्त काढणे.

**–विस्रुति**–स्त्री., **उपक्रम० रक्तस्य स्रावः रक्त मोक्षः** ( असंसू. २४ )
एक उपचार. रक्त काढणे. रक्ताचा स्राव करणे.

**अस्रिपत्**–वि., **पालिपत्, धारावत्** । ( सुचि. ३५.३२ )
धार असलेला, कडा असलेला.

**अस्व**–वि., **आत्मव्यतिरिक्तम्, अनात्मीयम्** ( चशा. ५.१२ )
आपल्या खेरीज, आपले नसलेले. दुसरा. दुसऱ्याचे.

**अस्वप्न**–पु., **रोग० निद्राल्पत्वं, निद्रानाशः अशीति वातविकारेष्वेकः** । ( चसू. २०.११ )
एक रोग. थोडी झोप येणे. झोपेचा नाश. झोप न येणे. ८० वातविकारांपैकी एक

**अस्विन्न**–वि., **अस्वेदितम्** ( सुचि. ३७.९३ )
घाम न काढलेले. न शिजविलेले उष्णता न लावलेले.

**अस्वेद**–पु., **लक्षण० स्वेदराहित्यं स्वेदावरोधो वा** ( चचि. ३.४० ) **स्वेदायोगः** ( अहृसू. २७.३६ )
एक लक्षण. घाम न येणे, घाम विरहित. घामाचा अवरोध.

**अस्वेदन**–न., **व्याधिलक्षण० घर्माभावः स्वेदाभावः** ( चनि. ५.७ सुउ. ४६.२२ )
एक लक्षण. घाम न येणे. घामाचा अभाव.

**अस्वेद्य**–वि., **स्वेदानर्हः** ( अहृसू. १७.२१ )
शेकण्यास अयोग्य. घाम काढण्यास अयोग्य. वाफारा देण्यास अयोग्य.

**अहतवासा**–वि., **अहतम् अधौतं शुद्धं शुक्लं वा वासो वस्त्रम् तदावृता सा अहतवासा** ( सुशा. २.२५ )
न धुतलेले ( कोरे ) शुद्ध पांढरे वस्त्र, अशा वस्त्राने युक्त, असे वस्त्र नेसलेली, असे वस्त्र पांघरलेली.

**अहन्**–न., **दिनम्** (अहृसू. १.८ ) दिवस

**( अहः ) स्वप्न**–पु., **दिवा स्वापः** ( अहृसू. १६.२७ )
दिवसा झोप घेणे, दिवसाची झोप,

**(अहो) रात्र**–पु., न., **कालविभागः दिवा निशम् त्रिशन्मुहूर्तमहोरात्रम्** ( सुसू. ६.५ )
**सूर्योदयद्वय–परिच्छिन्नः कालः**
श. क. द्रु., **शरदि वसन्ते च सममहोरात्रं भवति** ( सुसू. ४६.४७०–७१ )
काळविभाग. रात्रंदिन. दिवस रात्र. तीस मुहूर्त. दोन सूर्योदयामधील काळ.
शरद ऋतु व वसंत यात रात्र व दिवस सामान्यतः सारखे असतात.

**अहंकार**–पु., **अभिमानः राजसगुणः** ( सुशा. १.१८ )
**प्रकृतेः महान् महतोऽहङ्कार उत्पद्यते अयं त्रिगुणात्मकः सांख्यानां पञ्चविंशतितत्त्वेष्वेकः** ( सुशा. १.४ )
अहंभाव, अहंमन्यता, अभिमान, ताठा, गर्व, मीपणा हा राजसगुण. त्रिगुणात्मक एक तत्व. प्रकृति पासून महान् व त्यापासून अहंकार उत्पन्न झाला. सांख्यांच्या पंचवीस तत्वांपैकीं एक

**अहर्षण**–न., **शुक्रप्रदोषजरोग० सत्यपि ध्वजोत्थाने मैथुनाशक्तिः** ( चक्र. चसू. २८.१८ )
**स्त्रीसेवनेऽनुत्साहः ।**
शुक्राच्या दृष्टीने होणारा रोग. जननेंद्रिय ताठ होऊनही मैथुन करवत नाही. संभोगाविषयी व संभोगात आनंद नसणारा.

**अहास्यहासिन्**–पु., **लक्षण० अहास्यविषये हास्यवान्** ( चइ. ११.२० )
एक लक्षण. हसण्यासारखा विषय नसताना हसणारा; अस्थानी हसणारा

**अहि**–पु., **प्राणि० सर्प०** ( असंउ. ४१पृ. ३३२ )
सरपटणारा एक प्राणी; साप.
**वनस्पति० नागकेसरः** ( र. २६.५६ )
एक वनस्पती; नागकेशर
**खनिजद्रव्य० सीसकम्** ( र., ५.२२० )
खाणीतले एक द्रव्य. सिसे.

**–केसर**–पु., न., **वनस्पति० नागकेसरः** ( असंचि ९ तर्टेप्रत पृ. ५५ )
एक वनस्पती नागकेशर.

**–चर्मन्**–न., **सर्पनिर्मोकः घृतेन सह धूपार्थम् उपयुज्यते** ( असंउ. ४ पृ. ३८ )
सापाची कात. तुपासह धूप देण्याकरिता कात व तूप यांची धुरी देतात,

**–छत्रा**–स्त्री., **वनस्पति० शतपुष्पा ।** ( रा. ४.१ )
एक वनस्पती. बडीशेप, बाळंतशेप.

**(इक्षुविकार)**–शर्करा. ( ध. २.१०४ )
उसाचा एक पदार्थ; साखर.

**–ज**–पु., **कीट०, वायव्यकीट** ( असंउ. ४३ पृ. ३५१ )
एक किडा. वातप्रकृतीचा किडा.

**–दमनी**–स्त्री., **वनस्पति० नागदमनी**
एक वनस्पती. नागदवणी

**–दर्वी**–स्त्री., **वनस्पति० नागदमनी दर्वीकन्दः दर्वीकरकन्दः** ( र. ३०.४६ )
एक वनस्पती. नागदवणी. सापकंद

**–निर्मोक**–पु., **जाङ्गमद्रव्य० सर्पकञ्चुकः**(असंचि.१०) ( तर्टेप्रत पृ. ५७ )
**मषी चास्य गण्डमालादिष्वभ्यङ्गार्थम् ।** ( असंउ. ३५ पृ. २६५ )
एक प्राणिज द्रव्य. सापाची कात. हिची मशेरी गंडमाळेवर तेलातून लावण्यास उपयुक्त.

**–निर्मोचक**–पु., **सर्पकञ्चुकः सर्पनिर्मोकः धूपार्थमुपयुक्तः** ( र. २३.६ )
सापाची कात पहा 'अहिनिर्मोक धुरी करिता उपयुक्त.

**–पताक**–पु., **सर्प० स निर्विषः**' ( सुक. ४.३४ ) ( ४ )
एक साप. हा निर्विष असतो.

**–पुष्प**–न., **वनस्पति० नागकेसरम्** ( सुचि. १७.२८ )
एक वनस्पती; नागकेशर.

**–पूतन**–न., **बालरोगः** ( सुनि. १३.५८ )
**पर्यायाः–केचित्तं मातृकादोषं वदंत्यन्येऽहिपूतनम पृष्ठारुर्गुदकुट्टं च केचिच्च तमनामिकम् ।** ( अहृउ. २.७० )
**संप्राप्तिर्लक्षणानि च–दुष्टस्तन्यस्य पानेन मलस्याधावनेन च कण्डूदाहरुजावद्भिः पिडकाभिः समाचितः । अहिपूतनको नाम यथादोषं सुदारुणः ॥ भोजः ॥ स्विन्नस्यास्नाप्यमानस्य शिशोः शकृन्मूत्रसमायुक्तेऽधौते गुदे रक्तकफप्रकोपादन्तः- कण्डूमान् भूयरूपद्रवस्ताम्रो व्रणो जायते । तस्य कण्डूयनादनेके स्फोटा उद्भवन्ति तेषामेकीभूतं घोरं व्रणमहिपूतनं विद्यात्** ( सुनि. १३.५८, अहृउ. २.६९ )
**साध्यासाध्यता–साध्योऽयं रोगो बालानाम् । चिकित्सा–मातुः स्तन्यं पित्तश्लेष्महरैः शोधयेत्**

अन्तरपानार्थे श्वेतचन्दनं शृतशीताम्बुना देयम् । पानार्थे पटोलपत्रत्रिफलारसांजनविपाचितं घृतं बालकाय दद्यात्; व्रणपरिषेकार्थे त्रिफला बदरीप्लक्ष-त्वक्क्वाथं, व्रणलेपनार्थे श्वेतचन्दनक्षौद्रताक्ष्र्यशैल-लेपः; रागकण्डूत्कटे जलौकसा रक्तस्रावं कुर्यात् ।
एक बालरोग. अहिपूतना. अहिपूतनक. मातृका दोष. पूतना, पृष्टारु, गुदकंद, गुदकुट्टक, गुदकुट्ट, अनामिक हे पर्याय,

**संप्राप्ति व लक्षणे**–अंगावरच्या सदोष दुधाने, मळ नीट न धुतल्याने गुदाच्या भागात खाज, आग, वेदना असलेल्या पुळया होतात. हा त्रासदायक रोग आहे. घाम आलेल्या मुलाला स्नान न घातले व मळमूत्र न धुता तसेच ठेवले तर रक्त कफ प्रकोपा-मुळे आतून खाजणारा अति उपद्रव युक्त, तांबडा व्रण होतो. तो खाजविल्याने अनेक फोड होतात. ते सर्व एक झाले म्हणजे एक मोठा आणि अति त्रासदायक व्रण होतो. त्यालाच अहिपूतना म्हणतात.

**साध्यासाध्य**–हा साध्य आहे. आईचे दूध कफ-पित्तनाशक औषधांनी शुद्ध करावे. पडवळाची पाने, त्रिफळा, रसांजन यांनी सिद्ध तूप मुलाला द्यावे. पांडरे चंदन थंड पाण्यांत मधून मधून द्यावे. त्रिफळा, बोरीची पाने, पिंपरीची साल यांचा काढा शिंपडावा. पांढरे चंदन, मध, रसांजन व्रणाला लेप करण्याकरिता. लाली, कंड, अधिक असल्यास जळवा लावून रक्त काढावे.

**–फणामुखं**–पु., **यन्त्र० शङ्क्वाकारः शलाका–यन्त्रस्य भेदः**, “**व्यूहनक्रियौ द्वादश षोडशाङ्गुलौ द्वावहि-फणामुखौ**” ( असंसू. ३४.१५ ) **सुश्रुते इदं यन्त्रं सर्पफणमुखं यन्त्रनाम्ना निर्दिष्टम्** ( सुसू. ७.१४ )
एक सळई यंत्र. शंकूच्या आकाराची सळई. अडक-लेले शल्य वेगळे करण्याकरिता एक बारा अंगुळे व एक सोळा अंगुळे लांब, दोघांचे तोंड सापाच्या फणी सारखे असते. सुश्रुतात हे सर्पफणामुख नावाने सांगितले आहे.

**–फणावक्त्र**–न., **यन्त्र० अहिफणामुखम्** ( अहृसू. २५.३१ ) **अहिफणामुखयन्त्रम्**
नागाच्या फणीसारखे तोंड असलेले यंत्र. पहा ‘अहिफणामुखं.’

**–फेनक**–न., **वनस्पति निर्यास० अफूकम् ।** ( ध६. १२१ रा. ६.१९१ ) वनस्पतीचा डिंक. अफू.

**–भुक्**–स्त्री., **वनस्पति० नाकुलि** ( रा ७,१५२ ) **गन्धनाकुली** ( रा. ७.१५२ )
एक वनस्पती. मुगुंस वेल.

**–मर्दिनी**–स्त्री., **वनस्पति० गन्धनाकुली** ( रा. ७.१५४ ) एक वनस्पती. मुंगुसवेल.

**–मार–क**–पु., **वनस्पति० इरिमेदः** । ( ध. ५.१३३ )
हिवर प्रकार. गंधी हिवर.

**–मेद–क**–पु., **वनस्पति० इरिमेदः** । ( ध. ५.१३३ )
हिवर प्रकार. गंधी हिवर.

**–लता**–स्त्री., **वनस्पति० गन्धनाकुली** ( रा. ७.१५४ )
मुंगुसवेल.

**अहिंस्रा**–स्त्री., **वनस्पति० बृहती** ( सुसू. ३७.३ )
डोरली.
**जटामांसी** ( सुउ. ४५.३३ ) जटामांसी.

**अहिण्डुका**–स्त्री., **सविषकीट० विश्वम्भरभेदः ड. लक्षणम्–दष्टस्थाने तोददाहकण्डूशोथाश्च भवन्ति** ( सुक. ८.३३ )
**चिकित्सा–तद्विषनाशकः शिरीषाद्यगदः**
“**शिरीषं तगरं कुष्ठं शालिपर्णी सहानिशे ।**
**अहिण्डुकाभिर्दष्टानामगदो विषनाशनः ।**” ( सुक. ८.५२ )
विषारी किडा. विश्वंभर किड्यातील एक प्रकार. लक्षण–डसल्याच्या ठिकाणी टोचणी, आग, खाज, सूज. उपचार–सिरस, तगर, कोष्ठ, सालवण, रानमूग, दारुहळद, हळद यांचे चूर्ण, काढा उपयुक्त; याला शिरीषादि अगद म्हणतात.

**अहित**–वि., **अपथ्यम्** । ( असंसू. १०.३१ )
अहितकर. अपथ्याचे. समधातूंना विषम करणारे व विषम धातूंना अधिक विषम करणारे–बिघडविणारे, दूषित करणारे. अपथ्यकर. अपथ्याचे रोग वाढविणारे.

**–सम्भूत**–वि., **अपथ्यादिभिर्वृद्धिङ्गतः** ( सुउ. ३९.६६ )
अपथ्यादिकांनी वाढलेला.

**अहित्थ**–पु., **वनस्पति० वनमेथिका** ( ध. ६.११२ )
रानमेथी

**अहृद्य**–वि., **मनसोऽप्रियम्** ( सुचि. २६.९ )
मनाला न आवडणारे; मनाला अप्रिय.
**अरुचिकरम्** । ( सुउ. ४९.३ )
रुचि बिघडविणारे; रुचीला चागले नसणारे.
**हृदयाय अहितम्** । ( अहृसू. ५.२६ )
हृदयाला हितकर न होणारे; हृदयाला अहितकर, घातक.

**अहेतु**–पु., **असाधको हेतुः हेत्वाभासः। अहेतुस्तु चरकविमाने त्रिविधः; प्रकरणसमः संशयसमो वर्ण्यसमश्च।** ( चवि. ८.५७ )
साध्य न साधणारा हेतु; हेतु आहे असा आभास. चरकाने अहेतूचे तीन प्रकार सांगितले आहेत ते असे–
**१ प्रकरणसम**–उदाहरण–'नित्य असणारा आत्मा शरिरापासून वेगळा आहे.' असे एकाने म्हटल्यावर 'ज्या अर्थी आत्मा शरिराहून वेगळा आहे त्या अर्थी तो नित्य आहे. कारण शरीर अनित्य आहे' असें दुसऱ्याने म्हणावे. व त्यावरून शरिराहून आत्मा वेगळ्या धर्माचा आहे. असे सिद्ध करणे हा प्रकरणसम अहेतु.
**२ संशयसम**–जो हेतु संशयाच्या उत्पत्तीला तोच त्याच्या निराकरणालाही लागू असणे. उदाहरणार्थ– 'हा आयुर्वेद क्षेत्रातील आहे' असे एकाने म्हटल्यावर दुसऱ्याने 'पण तो चिकित्सक आहे कीं नाही ?' असे म्हणावे तेव्हां त्याला 'ज्या अर्थी याचे क्षेत्र आयुर्वेद आहे त्या अर्थी तो चिकित्सक आहेच' असे उत्तर देणे हा संशयसम अहेतु.
**३ वर्ण्यसम**–वर्णन करावयाच्या विशिष्ट कारणाहून जो निराळा नाही तो. उदाहरणार्थ–स्पर्श नसल्याने बुद्धि ही शब्दाप्रमाणेच अनित्य आहे. या ठिकाणी वर्णन करण्यायोग्य शब्द जर आहे तर बुद्धीही तशीच; म्हणून वर्णन करण्यात दोघांमध्ये वैशिष्ट असे नाहीच. म्हणून हा वर्ण्यसम अहेतु.

**–क**–वि., **हेतुरहितम् कारणरहितम्** ( सुउ. ४०.१६३ )
हेतुरहित, कारणरहित.

**अह्रीक**–वि., **ह्री लज्जा, तद्धीनः लज्जाहीनः।** ( चशा.८२१ ) लाज रहित, निर्लज्ज, लाज नसलेला.

**आकण्ठम्**–अव्य., **तृप्तिपर्यंतम्, कण्ठपर्यंतम् अतिमात्रम्।** ( अहृसू. १८.१४ )
पोट भरून, गळ्यापर्यंत, तृप्ति होईपर्यंत, अतिशय.

**आकर**–पु., **उपादानम्।** ( असंसू. ६.१३३.३४ )
**कारणरूप द्रव्य.**
ज्याचे आसव, अरिष्ट इत्यादि औषध बनते असे द्रव्य.
**खनिः** ( र. २३.३९ )
खाण, खजिना
**समुदायः** ( असंसू. ६.१३४ )
समूह, साठा.

**–संकर**–पु., **उत्पत्तिकारणानां संयोगः** ( असंसू. ६.१३४ )
उत्पत्तीच्या कारणांचा संयोग, मिश्रण.

**आकरालका**–स्त्री., **विदलधान्य० मसूरिका.** ( ध. ६.९५ )
मसुरीची डाळ.

**आकर्णिकम्**–अव्य., **कर्णिकां मर्यादीकृत्य** ( सुचि. ३८.३ )
कर्णिकपर्यन्त.
बस्तीच्या विधीत गुदात घालावयाच्या नळीला नेत्र म्हणतात. बस्ती आणि ही नळी ( नेत्र ) यांमध्ये गोल रुंद चकती असते तिला कर्णिका म्हणतात.

**आकस्मिक**–वि., **कारणं यस्य नोपलभ्यते तद् विनैव संसर्गप्राक्तनकर्मपीडितत्वेन जातो रोगः।** ( सुसू. २४.७ )
ज्याचे कारण सापडत नाही. ज्याला ज्ञात कारण नाही, दोषांच्या संसर्गावांचून पूर्वकर्माने होणारा. कर्मज.

**आकाङ्क्षा**–स्त्री., **इच्छा०** ( सुचि. ३७.६९ )
इच्छा. अपेक्षा.

**आकार**—**रूपम्।** ( च. इं. १.३ )
आकार; रूप; लक्षण.

**आकार**–पु., **अभिनयः** ( चवि. ८.२० )
अभिनय, भाषणशैली.
हावभाव. शब्द. चेहरा व हातपाय यांच्या अनुरूप हालचालीने भाव व्यक्त करणे.
**आकृतिः लक्षणम्।** ( अहृ. नि. १ )
आकृति. लक्षण. स्वरूप. रूप.

**–करभ** पु., **वनस्पति० गुणाः–कटुक उष्णो बलकृद्वातघ्नः शोथप्रतिश्यायघ्नश्च,** ( शालिग्रामनि. )
No—Compositae
L—Anacylus Pyrethrum
Eng—Pellitony
हिं.—अकरकरा; म.—अक्कलकारा;
गु.—अक्कलकरो; बं.—अकीरकोरा
ता.—अक्किरकारम्;

**आकाश**–न., **महाभूत० नभः, सत्वबहुलमिदम्** ( सुशा. १.२० )
एक महाभूत; आभाळ, अंतराळ, अंतरिक्ष.

**–गङ्गा** स्त्री., **नभसि नद्याकारा घनतारकसंततिः।** ( सुसू. ३०.२० )
आकाशात नदीच्या आकारासारखा दिसणारा अगणित तारकांचा समूह, पंक्ति.

**-ज**-वि., **आकाशोत्पन्नं द्रव्यगुणादिकम्** ( असंशा. ५ )
आकाशापासून उत्पन्न झालेला द्रव्य, गुण कर्म.

**-दर्शन**-न., **नीलवर्णज्वालाया दर्शनम्** (र. १३.३३)
आकाश दर्शन. कोष्ठिकायंत्रात मूषा ठेवून धमन केल्यास अशा आकाशी रंगाच्या निळ्या ज्वालेचे होणारे दर्शन.

**-देवता 'आकाशं खानि ते पान्तु' इति** (सुसू. ५.२८)
एक देवता.
**खनिज० अभ्रकम्** । ( रा. १३.२ )
अभ्रक, एक खनिज.

**-मांसी**-स्त्री., **वनस्पति० गुणाः शीता वर्णकारिणी, शोफव्रणनाडीरुजालूतागर्दभजालघ्नी च** । ( रा. १२.९५ )
No.—VALERIANACEAE
L.—NOR DAS TOCHYE JATA MANSI
ENG.—SPIKENARD.
हिं.–जटामांसी;
म.–जटामांसी;
फारसी–सुबूल.
गुण–थंड, वर्णसुधारक सूज, नाडीव्रण, पीडाहर लूताविष व गर्दभजाल रोगनाशक.

**-वल्ली**-स्त्री., **वनस्पति० ख वल्ली०** ( रापरि. ३.१९ )
आकाशवेल, अमरवेल.

**-सलिल**-न., **दिव्योदकम्** । ( रा. १४.३२० )
आकाशातून पडणारे पाणी; पावसाचे पाणी.

**आकाशात्मक**-वि., **आकाशीयम्** । ( चशा. ४.१२ )
**आकाशगुणभूयिष्ठं द्रव्यादि** । ( चसू. २६.११ )
आकाश महाभूताचे गुणकर्म आधिक्याने असलेले द्रव्य. आकाशाचे, आकाशयुक्त.

**आकुञ्चन**-न., **संकोचक्रिया** ( सुशा. ७.३ )
आकुंचन, आकसणे, खेचणे, आखडणे.
**कुटिलीकरणवद् वेदनाविशेषः** ( सुसू. २२.११ )
ओढ लागणे, खेचणे अशा प्रकारची वेदना.

**आकुल**-वि., **व्यस्तं व्याकुलमसंगतम्** ( चवि. ८.६७ )
गोंधळलेला.

**आकुली**-स्त्री., **वनस्पति० गन्धनाकुली** ( र. १७.६९-७५ )
**गंधनाकुली**. चांभारआवळी.

**आकृति**-स्त्री., **लक्षणम्** ( चचि. ३.८-९ )
रूप, लक्षण, आकार.

**आकृष्ट**-न., **आक्रोशः** ( सुसू. २९.४४ )
आक्रोशाचा आवाज, खोल गेलेला आवाज.

**आकोटनम्**-न., **पीडनं, ताडनम्** । ( चशा. ८.४१ )
ठोकणे, दाबणे, थापट्या मारणे.

**आकोठितम्**-वि., **ताडितम्** । ( चचि. १३.४८ )
ठोकलेला. पोटावर बोटे ठेवून त्यावर दुसऱ्या हाताच्या बोटांनी ठोकण्यासारखे.

**आक्त**-वि., **मिश्रितम्** । ( सुचि. ९.१६ )
मिश्रित, युक्त, माखलेले, चोपडलेले.

**आक्रन्द**-पु., **आक्रोशस्वनः** । ( सुसू. २९.४४ )
रडण्याचा आवाज; आक्रोश.

**आक्रमण**-न., **क्रामणं, संक्रामणम् । घनसारचतुर्जातकंकोलं कटुकीफ ( प ) लम् फ ( प ) लं ताम्बूलवल्लीनां रसस्याक्रमणं परम्** । ( र. ३०.९० )
कापूर, दालचिनी, तमालपत्र, वेलची, नागकेशर, कंकोळ, कुटकी ही द्रव्ये ४ तोळे व विड्याची पाने ४ तोळे ही शरिरात पारदाचा सम्यक् संचार करणारी द्रव्ये.

**आक्रय**-पु., **मूल्यम्**। ( चसू. १५.३ ) मूल्य. किंमत.

**आक्ष**-वि., **अक्षस्य बिभीतकस्येदं तैलफलादि** ( सुसू. ४६.२०० )
अक्ष–बेहड्या संबंधी; बेहड्याचे फळ, तेल, इत्यादी.

**आक्षिक**-न., **बिभीतकम्** । ( सुसू. ४६.१९४ ) बेहडा.
**अक्षिकीफलम्** । ( सुसू. ४६.१९४ ड. )
बेहड्याचे फळ.

**आक्षिकी**-स्त्री., **बैभीतकी ( बिभीतककृता ) सुरेयं पाण्डुरोगव्रणहिता दीपनी च** ।
( चसू. २७.१८६ ) बेहड्याची बनलेली दारू. पांडुरोग नाशक, व्रणाला हितकर व दीपन आहे.

**आक्षेप**-पु., **आकर्षणम्** । ( अहसू. २८.५ )
आकर्षण, आकुंचन. ( स्नायूत शल्य गेले तर )
**आदानम्** ( अहसू. २१.१२ ) घेणे. पिणे. ( धूम )
**क्षोभः** ( अहसू. ५.९ )
उसळणे, वर उडणे ( दगडावर आपटलेले पाणी. )
**वातरोग० आक्षेपक०** ( चचि. २८.२३ )
**आक्षेपकनामकः एकः वातिकः रोगः** एक वातरोग.

**आक्षेपक**-पु., **वातरोग० अशीतिर्वातविकारेष्वेकः** । ( चसू. २०.११ )
**निरुक्तिः–हस्त्यारूढपुरुषस्येव देहचालनादाक्षेपादाक्षेपकः 'मुहुर्मुहुस्तदाक्षेपक इति स्मृतः** । ( सुनि. १.५१ )

ज्या वातरोगात मधून मधून हातपाय अव्यस्थितपणें फेकले जातात तो रोग. हत्तीवर बसलेल्या पुरुषाप्रमाणे शरिराचे अवयव व शरीर हालत असते तो आक्षेपक रोग. ऐशी वातरोगांपैकी एक.

**संप्राप्ति—यदा कुपितो वायुः सर्वा धमनीरभ्येति तदा स मुहुर्मुहुर्देहमाक्षिपति ।** ( सुनि. १.५१ )

**लक्षणम्—गात्राणां पाणिपादयोश्च मुहुराक्षेपणं सस्नायुकण्डराणां सिराणां संशोषणञ्च । सर्वेष्वाक्षेपकेषु गते वेगे स्वास्थ्यं भवति ।**

( चचि. २८.५० )

**अपतानकस्य दण्डायामादिभेदा आक्षेपकस्य विशेषाः ।** ( सुनि. ५२.५८ )

**संप्राप्ति**—जेव्हा प्रकुपित वायु सर्व धमन्यांस दुष्ट करतो. तेव्हां शरिरास आचके आणतो. **लक्षण**—हातपाय व इतर गात्रे यांना मधून मधून झटके येणे व स्नायु, कंडरा, शिरा यांचे शोषण. याचा वेग गेल्यावर पुन्हा पहिल्यासारखे वाटते. दंडायाम इत्यादि अपतानकाचे प्रकार आक्षेपकाचेच विशेष होत.

**आक्षेपण**—न., **अंगविक्षेपः** ( सुनि.१.३१ )

**अङ्गस्याकर्षणेन त्रोटनम्** ( इन्दु ) ( सुनि. १५.३ )

अंगविक्षेप. हातपाय फेकणे, आपटणे.

**आक्षोड**—पु., **अक्षोटः** ( ध. ५.६० ) आक्रोड.

**आखु**—पु., **मूषकः** ( सुशा. ४.६७ ) उंदीर.

**वृक्षमूषिकः** ( सुउ. ४१.३६ )

झाडावर राहाणारा उंदीर.

**-कर्णिका**—स्त्री., **वनस्पति० मूषककर्णी, मूषिकपर्णी.** ( चसू. ४.११ र. ११.५२–५७ ) उंदीरकानी.

**-कर्णी**—स्त्री., **वनस्पति० मूषककर्णी—मूषकपर्णी.**

( चसू. ४.११ ( १५ )

NO.—IPOMOCA RENNIFO RMIS

L—LECT CARE MOFIFLO. RA

हिं.—मूसाकानी.

म.—उंदीरकानी, भोपनी.

गु.—उंदीरकानी

बं.—उंदूरकानी पाना

त.—चवारिया रकून्तल

–गोरोमुष, सतर.

त्रसि., ८.९.१० )

**दन्ती नामक वनस्पति०** दाती, दाती मूळ.

**-घृत**—न., **योग० इदं मूषकैः सह विपक्वमस्ति, ऊर्ध्वजत्रुजरोगेषूपयुज्यते ।** ( चचि. २६.१७५ )

एका सिद्ध तुपाचे नांव. हे उंदराचे मांस शिजवून करतात. हे मान व डोके यांतील विकारांवर उपयोगी.

**-पर्णिका**—स्त्री., **वनस्पति० द्रवन्ती** ( ध. १.२२९ )

( चचि. ३०.१०७ )

उंदिरकानी; द्रवन्ती नावाची वनस्पति.

**-पर्णी**—स्त्री., **वनस्पति० दन्ती.** ( चसि. ८९.१० )

दांती.

**-विन्ना**—स्त्री., **वनस्पति० मूषकपर्णी, मूषिकपर्णी** ( असंउ. ४६ पृ. ३७८ ) उंदीरकानी

**-विषहन**—पु., **वनस्पति० देवदाली** ( ध. १.१७३ )

देवडांगरी.

**-वृक्ष**—**वनस्पति० मदनफलम्**

( असंउ. ४६ पृ. ३७८ ) गेळफळ

**आगति**—स्त्री., **संप्राप्ति.** ( चनि. १.११ )

रोगाचे कारण घडल्यानंतर दोष कसे दुष्ट झाले, शरिरात कसे कोठून कोठे गेले आणि रोग निर्माण केला हे स्पष्ट करणारी पद्धत.

**आगन्तु**—वि., **पश्चात्कालभावि** ( चइ. १२.६५ )

पुढे प्राप्त होणारे ( आरोग्य )

**बाह्यहेतुजोऽभिघातनिमित्तो निजेतरो रोगप्रकारः**

( चसू. २०.३, सुसू. १.२५ )

बाह्य कारणांनी उत्पन्न होणारा. आघातापासून होणारा ( रोग )

**हेतवः—अभिशापाभिषङ्गाभिघातपतनपीडनबन्धनव्यधनरज्जुदहनशस्त्राशनिभूतोपसर्गविषवाय्वग्निक्षतभङ्गादयः** ( चसू. २०.४, अहसू. ४.३२ )

कारणे—शाप, जारण मारण, आघात, पडणे, दाबले जाणे, बांधणे, टोंचणे, दोराने बांधणे, जळणे, शस्त्राचा मार, वीज, भूतांचा संपर्क, विष, वायूची बाधा, जखम, हाड मोडणे इत्यादी.

**निजागन्त्वोर्भेदः—निजो दोषोत्थः; तस्मिन् पूर्वं वातादयो वैषम्यमापद्यन्ते, ततो व्यथाऽभिनिर्वर्तते बाह्यहेतुजस्त्वागन्तुः तस्मिन् प्रहारेण व्यथापूर्वमुपजायते ततो दोषवैषम्यम्** ( असंसू. २२ )

निज व आगंतु यात भेद—निज हा दोषांपासून होतो. त्यात प्रथम वातादि दोषांचे वैषम्य उत्पन्न होते; नंतर विकार—पीडा निर्माण होते, आगंतु हा बाह्य

कारणांनी होतो; त्यात प्रहार—आघात प्रथम होतो नंतर दोषांची विषमता निर्माण होते.

**आगन्तुभेदाः—शारीराः मानसाश्च** ( चसू. १.३६ )
आगंतूचे २ प्रकार १ शारीर व २ मानसिक.

**आगन्तुरोगाः—आगन्तुज्वरः** ( असंनि. २.३५ )
**आगन्तुविद्रधिः** ( सुनि. ९.१३ )
**आगन्तुशोफः** ( चसू. १८.४ )
**आगन्तुशल्यम्** ( सुसू. २६.६ ) **एते शारीराः।**
**कामक्रोधलोभाद्याश्च मानसाः।** (अहसू. ४.३२)
आगंतुशारीररोगः—आगंतुज्वर, विद्रधि, सूज, शल्य, इत्यादी.
आगंतुमानसिकविकारः—
काम, क्रोध, लोभ इत्यादी.

**—भवा**—वि., **सप्तविधनिद्रास्वेका** (असंसू. ९.६८)
झोपेच्या सात प्रकारांपैकी एक.
**शस्त्रप्रहारादिना जाता सुश्रुते 'आगन्तुकी' नाम्नैषा निर्दिष्टा।**
शस्त्रप्रहार इत्यादी कारणांनी येणारी झोप. ही आगंतु म्हटली आहे.

**आगन्तुक**—वि., **शारीरेतरशल्यप्रकारः।** ( सुसू. २६.४ )
**शारीरं दन्तरोमनखादिधातवोऽन्नमला दोषाश्च दुष्टाः आगन्त्वपि शारीरशल्यव्यतिरेकेण यावन्तो पदार्थास्तृणकाष्ठपाषाणलोहलोष्ट्रप्रभृतयो दुःखमुत्पादयन्ति।** ( सुसू. २६.६ )
दोष, नख, दात, इत्यादि शारीर शल्यांखेरीज गवत लाकूड इत्यादि बाह्य पदार्थ शरिरात गेले की जे शल्य होते त्याला आगन्तुक शल्य म्हणतात.

**आगन्तुकी**—वि., **सप्तविधनिद्रास्वेका।** ( चसू. २१.५८ )
**रिष्टभूता, शस्त्रप्रहारादिना वा जाता विसंज्ञता। 'आगन्तुभवा' नाम्नाऽस्या निर्देशो वाग्भटे** ( अहसू. ९.६८ )
सात प्रकारच्या झोपांपैकी एक झोप. ही मरणदर्शक.
शस्त्र प्रहारादिकांनी येणारी मूर्च्छारूपी एक झोंप.

**आगम**—पु., **आगच्छत्यस्मादिति आगमो हेतुः** ( चचि. २२.२४ )
**हेतुः, कारणं, निदानं योगः संयोगो वा** ( चशा. १.९८ )
ज्याच्या पासून आला तो आगम; म्हणजे कारण, हेतु. रोगकारण. रोगज्ञानाचे कारण. एकत्र येणे. संयोग.
**आगमनं, प्रवेशः, प्रारम्भो वा** ( अहनि. २.१० )
येणे, प्रवेश, प्रारंभ, आरंभ,
**आयुर्वेदः, तस्योपदेशो वा** ( असंसू. २२ )
आयुर्वेद. आयुर्वेदाचा उपदेश.
**आगमयति बोधयति सूक्ष्मविप्रकृष्टानर्थानित्यागमः. वेदः, शास्त्रम्** ( सुसू. ४०.४ )
जो सूक्ष्म व खोल असा अर्थ समजावून सांगतो तो आगम; वेद, शास्त्र.
**परीक्षणार्थे प्रयुक्तेषु प्रमाणेष्वेकम्** ( सुसू. १.१६ )
**आप्तागमः।** ( चसू. ११.२८ )
**आप्तोपदेशः।** ( चवि. ४.३ )
**आप्तवचनम्।** ( चवि. ४.४ )
**ऐतिह्यम्।** ( चवि. ८.४१ )
**इत्येतेऽस्य पर्यायाः**
परीक्षणाकरिता आवश्यक अशा प्रमाणांपैकी एक प्रमाण. आप्तागम इत्यादि आगम शब्दाचे पर्याय शब्द आहेत.
**प्राचीनो रसाचार्यः।** ( र. ३.५२ )
एक प्राचीन रसाचार्य.

**आगमावर्ता**—स्त्री., **वनस्पति० वृश्चिककाली** ( ग. शां. २.८ )
विंचवी. हिंदीमध्ये बिच्छुबूटी म्हणतात.

**आगस्त्य**—वि., **अगस्त्यवृक्षस्येदम्** ( सुसू. ४६.२८२ )
हदग्याच्या झाडाचे पान, फूल इत्यादी.

**आगार**—न., **गृहम्, स्थानम्.** ( सु.चि. ३.४ )
घर. स्थान. रहाण्याची किंवा वस्तु ठेवण्याची जागा.

**—कर्णिका**—स्त्री., **गृहसंबन्धिकाष्ठः, गृहाच्छादनमध्ये गृहाच्छादनकाष्ठनिबन्धनी।** ( च.सू. ३०.५ )
घराचे एक लाकूड. घराच्या छताच्या लाकडांना जोडणारे लाकूड; आढे.

**—गोधिका**—स्त्री., **प्राणि० गृहगोधिका** ( सु.चि. १.१०८ ) पाल.

**—धूम**—पु., **भित्तिषु संचितो धूमः, गृहधूमः** ( सु.चि. ९.१० )
भिंतीवर जमा झालेला धूर; घेरोसा.

**आग्नेय**—न., **कृत्तिकानक्षत्रम्** ( असंउ. ४१ पृ. ३३८ )
कृत्तिका नक्षत्र
**खनिज. सुवर्णम्** ( रा. १३.३ ) सोने.
**महाभूतस्याग्नेः शरीरकार्यं शरीरांशो वा**
**आग्नेयानि—दर्शनं रूपं पित्तमूष्मा पक्तिः संतापो मेधा वर्णो भास्तेजः शौर्यञ्चेति** ( असंशा. ५.११ ) ( च.शा. ७.१६ )
अग्नि या महाभूताचे शरीरकार्य किंवा शरीरांश

पित्त, उष्णता, पचन, संताप, बुद्धि, वर्ण, प्रभा, तेज, शौर्य ही सर्व आग्नेय आहेत.
**यदग्निगुणभूयिष्ठं तत् तेजोभूयिष्ठम्** ( सु.शा. ३.३ )
अग्नीचे गुण ज्यात आधिक्याने आहेत ते द्रव्य.

**आग्नेयी**–स्त्री.,–छाया० **इयं विशुद्धरक्ता दीप्ताभा दर्शनप्रिया च ।** ( चइं. ७.११ )
एक छाया; विशुद्ध रक्ताची तेजस्वी व मोहक अशी ही छाया असते.

**–ऋतु**–पु., **आग्नेयकालः, ग्रीष्मः** ( सुचि. ३.८–९ )
ग्रीष्मऋतु, उष्णऋतु, उन्हाळा.

**–काल**–पु., **आदानकालः** ( असंसू. ४.६ )
खाणारा काल; प्राणिमात्राचे बल खाणारा–नाहीसे करणारा काल.

**–ज्वर**–पु., **ज्वरस्य विधिभेदः** ( चचि. ३.३२ )
ज्यात शरिराची उष्णता अधिक होते तो. एक ज्वरप्रकार.

**–धूप**–पु., धूप. **का धूपकल्पाध्यायः**
धूपाचा एक प्रकार.

**–मर्मन्**–न., **तेजोभूयिष्ठं मर्म, तच्च सद्यःप्राणहरम् ।** ( सुशा. ६.१६ )
या मर्मावर आघात झाल्यावर ताबडतोब प्राणनाश होतो. हे आग्नेय मर्म होय.

**–लोक**–पु., **अग्निभूताधिदैवतस्वभावो लोकः** ( सुसू. १.२२ ) आग्नेय स्वभावाची जीव सृष्टि.

**–विसर्प**–पु., रोग. **विसर्पविशेषः आग्नेयो वातपित्ताभ्याम् ।** ( चचि. २१.१४ )
धावऱ्याचा एक प्रकार; वात आणि पित्त या दोषांपासून हा होतो.

**–व्याधि**–पु., **पैत्तिको रोगः** ( चनि. १.४ )
पित्तात्मक रोग

**आघट्टक**– पु.,वनस्पति. **अपामार्गभेदः, रक्तापामार्गः, अपामार्गः** ( रा. ४.३९० ) लाल आघाडा.

**आघात**–पु., **अवरोधः, दुष्टिः** ( सुउ. ५८.१ )
अडणे; जसे–मूत्राघात. मूत्रदुष्टि.

**–काल**–पु., **ग्रहादीनामावेशकालः** ( चचि. ९.११ )
पिशाचादि ग्रहांचा शरिरात प्रवेश करण्याचा काल.

**आघातन**–न., **वधस्थानम्, घातस्थानम्** (चसू. ८.१९ )
वधस्थान; सुळावर देण्याचे स्थान, फाशी देण्याचे स्थान

**आघ्रात**–वि., **उत्पलादिपुष्पानुप्रविष्टं नस्योपयोज्यं वामकं द्रव्यं; घ्राणेन गृहीतम्**
चिकित्सेचा विशेष; ओकारी करणाऱ्या इत्यादी द्रव्यांचे चूर्ण नीलकमळासारख्या फुलावर पसरून ओकारी होण्याकरिता हुंगणे, हुंगलेला, वास घेतलेला.

**आचमन**–न., **योनिप्रक्षालनोदकम्** ( सुशा. २.१२–१३ ड. )
योनि धुण्याचे पाणी. योनि धुणे, गुळण्या करणे.
**वनस्पति० वालकम्** ( ध. १.४७ )
वाळा, सुगन्धी वाळा.

**आचमनीय**–वि., **पात्र० आचम्यते येन पात्रेण तत्** ( चसू. १५. ७ )
ज्या पात्राने आचमन केले जाते ते पात्र. संध्येची पळी, आचमन करण्याचे पाणी.

**आचय**–पु., **समन्ताच्चयनम्, समुदायः** (अहसू. ७.२३ )
चारी बाजूंनी केलेला संचय, समुदाय, समूह.

**आचार**–पु., **शास्त्रशिक्षाकृतो व्यवहारः** ( चइं. १.३ )
शास्त्रोक्त व्यवहार. शास्त्राला धरून केलेला व्यवहार.
**कायवाङ्मानसं कर्म ।** ( सुसू. १.२७ )
शरिराचे, वाचेचे, मनाचे कर्म. या तिघांच्या द्वारे होणारे कर्म.
**कुलदेशाद्यनुगतं लौकिकं विधानम्** ( सुसू. २.३ )
कूळ, देश, इत्यादींच्या रूढीप्रमाणे करावयाचा व्यवहार. वागणूक.

**–चपल**–वि., **सर्पसत्वलक्षण०**
**व्यापारे चपलः ।** ( सुशा. ४.८९–९० )
सर्पांच्या स्वभावाप्रमाणे असलेल्या व्यक्तीचे एक लक्षण. चंचल, आचार, व्यवहार अगदी झटपट करणारा.

**–रसायन**–न., **आचार एव रसायनम् यथा सत्यभाषणं, अक्रोधः, मद्यमैथुनान्निवृत्तिः, अहिंसा, प्रियभाषणं जपशौचपरता, धैर्यं, दाननित्यता, देवगोब्राह्मणाचार्य-गुरुवृद्धार्चनरतिः, नित्यमानृशंस्यपरता, नित्यं करुणार्द्रता, समजागरणस्वप्नता, युक्तिज्ञता,शस्ताचारता, अध्यात्मप्रवणेंद्रियता, वृद्धास्तिकजितात्मनां सेवा, धर्मशास्त्रपरता च आचरणमेतत् नित्यरसायनमेव अपि च एतैर्गुणैस्समुदितै रसायनं यः प्रयुङ्क्ते स यथोक्तान्सर्वान्रसायनगुणान् समश्नुते ।** ( चचि. १.४ ३०–३५ )

शरिरातील रसादि धातु विशुद्ध व बलवान्—सारवान् करणारे ते रसायन. ज्या आचरणाने शरीर, रसादि धातु विशुद्ध व सारवान् होतात ते आचार रसायन. खरे बोलणे, न रागावणे, मद्यपान व मैथुनापासून अलिप्त असणे, अहिंसा, प्रियभाषण, जप, पवित्र आचरण, धैर्य, दान प्रवृत्ति, देव, गाय, ब्राह्मण, आचार्य, गुरु, वृद्ध यांची पूजा करण्याची प्रवृत्ति, दयाळु वृत्ति, परदुःखाने दुःखी होण्याचा स्वभाव, जागणे व झोप यांत सारखी वृत्ति, उत्तम योजकता, गर्व नसणे, सभ्य आचरण, इंद्रियांची प्रवृत्ति अध्यात्माकडे असणे, वृद्ध व आस्तिक आणि जितेंद्रिय व्यक्तींची सेवा, धर्मशास्त्रावर निष्ठा ह्या गुणांचे आचरण म्हणजे नित्य रसायनच होय. आणि अशा गुणांनी युक्त जो मनुष्य रसायन सेवन करतो तो शास्त्रात सांगितलेले त्याचे सर्व फल मिळवतो.

**–विधि**–पु., पथ्याचारः—**उष्णोदकोपचारी ब्रह्मचारी, क्षपाशयश्च स्यात्, यान्यहानि स्नेहं पिबेत्तान्यहानि, व्यायामवेगसंरोधशोकवर्षहिमातपप्रवातयानयानाध्वभाष्यात्यशनसंस्थितिनीचात्युच्चोपधानाहःस्वप्नधूमरजांसि च त्यजेत्। अग्रेऽपि तावन्त्येवाहानि व्यायामादि सर्वं त्यजेत्, सर्वकर्मसु व्याधिक्षीणेषु च प्रायोऽयमेव क्रमः**

( असंसू. २५.४१–४४ )

हितकर आचार. वांती, रेचक इत्यादींनी शरिराचे शोधन घेतल्यावर व शोधन झाल्यावर तसेच शोधन घेण्यापूर्वी तूप, तेल इत्यादी स्नेह घेतल्यावर ही करावयाचे सर्व व्यवहार ऊन पाण्याने करणे, ब्रह्मचर्य पालन, रात्री झोप घेणे, जितके दिवस स्नेहपान केले असेल तितके दिवस व्यायाम, मलमूत्र इत्यादींचे वेग अडवणे, शोक, हर्ष, थंडी, ऊन्ह, सोसाट्याचा वारा, वाहनावर प्रवास, पायी प्रवास, अतिभाषण, अतिभोजन, अतिबैठक, अगदी उंच किंवा अगदी कमी उसे घेणे, दिवसा झोप; धूर व धूळ इ. सर्व गोष्टीपुढे ही सोडाव्या. सर्व पंचकर्म आणि व्याधींनी क्षीण झालेल्यांनीही असेच वागावे, हा पथ्याचार.

**आचारिक**–वि., **स्नेहविध्युक्तः आहारादिनियमः**

( अहसू. २८. २५ )

रेचक इ. शरीरशुद्धि करणारी औषधे घेण्यापूर्वी तूप तेल इत्यादि स्नेह घ्यावयाचे असतात. ते घेण्याचा विधि व त्यानंतर करावयाचे पथ्याचरण.

**आरोग्यनियमः** । ( सुचि. ६.४ )

आरोग्याचे नियम. स्वस्थाचरण.

**चर्या**. ( सुचि. ३८.११३ )

रात्रंदिवस वागावयाचे नियम.

**आचार्य**–पु., **गुरुः, शास्त्राधिगमहेतूनां श्रेष्ठः** ।

( च. सू. २५.४० )

गुरु, उपदेशक, शास्त्र कळण्याच्या सर्व कारणात गुरु श्रेष्ठ आहे.

**मोक्षशास्त्रोपदेष्टा** । ( चशा. ५.१२ )

मोक्षाचे ज्ञान देणारा.

**आचित**–वि., **व्याप्तम्** । ( सुनि. १६.६ )

व्याप्त, परिपूर्ण, भरलेला.

**युक्तम्** । ( सुचि. ३०.३५ ) युक्त, सहित.

**आचूची**–स्त्री., **बालानामौषधदानस्य साधनम्** ।

( कासि. ३ ( पृ. १५४ )

मुलांना औषध देण्याचे साधन; चमचा, बोंडले, शिंप.

**आचूषण**–न., उपक्रम० **चूषणम्—शृङ्गेण, अलाबुना ( व्वा ) मुखेन वा स्तन्य—रक्तादीनां निष्कासनम्**

( सुसू. ७.१७ )

चोखणे. स्तनातील विकृत दूध, रक्त इ० चोखणे व फेकून देणे. शिंग, तुंबडी, यांनी ही दूध रक्त ओढून घेणे हा एक उपचार आहे.

**आच्छादन**–न., **आवरणम्** । ( अहसू. २६.४१ )

झाकण. आवरण.

**आवापः** ( र. ८.५४ )

वितळलेल्या धातूत योग्य द्रव्य टाकणे याला आच्छादन, आवाप, प्रतिवाप म्हणतात.

**आज**–वि., **अजस्य अजायाः वा इदम्**

बकऱ्याचे—बकरीचे मूत्र, दूध, इत्यादी.

**आजन्म**–अ., **जन्मप्रभृति**. ( अहसू. १०.७ )

जन्मापासून.

**–सात्म्य**–न., **जन्मकालाद्यदुपशेते तत्**

( अहसू. १०.७ )

जन्मापासून आत्मसात् झालेले; पथ्यकर.

**–सुरभिपत्र**–पु., **वनस्पति. जम्बीरः** ( रा. १०.८१ )

मरवा, मरूबक, जम्बीर, ईडनिंबू.

**आजानेय**–पु., **उत्तमकुलजातोऽश्वः** । ( चशा.८.९ )

" **आजानन्ति यतः संज्ञामाजानेयास्ततः स्मृताः** "

( शब्दक. अश्वतन्त्रे. )

जातिवंत घोडा. मालकाच्या इशाऱ्याच्या सूक्ष्म छटांचा अर्थ समजणारा.

**आज्ञा**—स्त्री., **अनुल्लङ्घनीय आदेशः** ( सुसू. ३४.१०–११ )
आज्ञा. उल्लंघन करू नये असा आदेश.
**–विधेय**–वि., **आदेशकारी** ( सु. क. १.१४–१६ )
आदेश देणारा, आज्ञापक, आज्ञा देणारा.
**–सिद्ध**—न., **सिद्धयोग. कमलाविलासरसस्य अपरं नाम, निश्चितगुणकारि** ( र. २६.५२–५३ )
कमलाविलास नामक रस–औषधीचे दुसरे नाव अचूक गुणदायक.

**आज्य**—न., **घृतम्** ( रस. २.७५ ) तूप.

**आञ्छन**–न., **आकर्षणेन स्वस्थाने स्थापनम्** ( सुचि. ३.१८ )
**यन्त्रकर्म.** ( सुसू. ७.१७ )
**भग्नोपक्रमः** ( सुचि. ३.१८ )
ढळलेले हाड ओढून स्वस्थानी आणून ठेवणे, हे एक यंत्रकर्म आहे. मोडलेल्या हाडाचा उपचार.

**आटक**–पु., **गुग्गुलुः** ( र. २०.१३०–१३६ ) गुग्गूळ.

**आटरूष**–पु., **वनस्पति० वासकः अयं तिक्तः कटुस्तुवरकः** ( भा. प्र. ) **शीतो, लघुः, स्वर्यो, हृद्यो, वातकृत्** ( भा. प्र. ) **कफपित्तघ्नो, रक्तविकारकासक्षयच्छर्दिकुष्ठज्वरतृष्णारक्तपित्तकामलावैकल्यादिघ्नः शाकार्थमप्युपयुज्यते.** ( ध. १.२३ ( च.सु. ३.३ ) ( सु. सु. ४६.२६२.२७० )
गुण–कडू, तिखट, तुरट, थंड, लघु, आवाजाला हितकर, हृदयाला हितकर, वातकर, कफपित्तनाशक रक्तविकार, खोकला, क्षय, वांती, कोड, ताप, तहान, रक्त–पित्तविकारात स्रवणारे रक्त थांबवणारा व कावीळ, विकलतानाशक असून भाजीसाठी ही वापरतात.
NO.—ACAN THACEAE
L.—ADHATODA VASIKA
हिं.—अडूसा, विसोंटा, वासा.
म.—अडुळसा
गु.—अरडुसो.
बं.—वाकस, छोट वाकस.
त.—अधडोडे.

**आटरूषक**–पु., **आटरूषः** ( सु.सू. ४६.२६२.२७० )
अडुळसा.
**–स्त्री., वनस्पति०, कण्टकारीभेदः, कासघ्नी इति नाम** ( ध. १.९८ )
रिंगणीचा एक प्रकार, कासनाशक म्हणून 'कासघ्नी'

**आटा**–स्त्री., पक्षि०, ( अहृसू. २६.१० )
आटी पक्षी. समुद्रात राहाणारा बगळ्यासारखा पक्षी–आडी.
**–मुख**–न., **शस्त्र० आटीमुखम्** ( असंसू. ३४.२७ ) ( सु.सू. ८.४ )
आटीपक्षाच्या तोंडाप्रमाणे चोंचीप्रमाणे तोंड असलेले शस्त्र.
**–वदन**–न., **शस्त्र० आटीमुखम्** ( अहृसू. २६.१० )
पहा 'आटीमुख'.

**आटालत्व**–न., **विस्तृतत्वम् अटालत्वम्** ( चनि. ३.१४ )
विस्तृतपणा ( योनीचा )

**आटी**–स्त्री., **पक्षि० जलवर्धनी** ( सुसू. ८.४ )
**अयं समुद्रतीरे कोङ्कणप्रान्ते उपलभ्यते, बकसदृशः प्रसिद्धः पक्षी. द्रष्टव्यं 'आटा'.**
**–मुख**–न., **शस्त्र० अङ्गुष्ठायतं फलं, सप्ताङ्गुलं वृन्तं, केशप्रमाणधारं विस्रावणोपयोगि शस्त्रम्** ( सुसू.८.३ ) पहा 'आटा'.

**आटोप**–पु., **रोगलक्षण० उदरे गुडगुडशब्दः** ( चनि. ८.६ ) पोटांत 'गुडगुड' शब्द होणे.
**उदरापूरः** ( सुउ. ४२.८ ) उदर पुरेपूर भरणे.
**नाभेरधो मन्दसञ्चारवायुता ।** ( असंनि.११ )
बेंबीच्या खाली वाताचा थोडा संचार; बेंबीच्या खालचे पोट थोडे फुगणे.
**ईषत्सशब्दमाध्मानम् ।** ( सुसू. १५.१५ )
वाताने गुडगुड इ. थोडे थोडे होत असणे; पोटाची फुगवटी.
**वातादीनामप्रवृत्तिः** ( सुक. १.४२ )
वात, मल मूत्र यांची विसर्जन होण्याची अप्रवृत्ति. वातादिकांचा अवरोध.
**रुजापूर्वकक्षोभः ।** ( सुनि. ९.२० )
पीडायुक्त वाताचा क्षोभ.
**क्षोभः** ( अहृसू. २८.८ ) फुगवटी. वाताचा क्षोभ.

**आडूक**–न., **पात्र० बालानामौषधप्रदानार्थं क्षुद्रनौकाकारं साधनम्** ( कासि. ३ पृ. १५५ )
मुलाना औषध देण्याकरिता छोट्या नावेच्या आकाराचे साधन, चमचा बोंडले, शिंप.

**आढ**–न., **मान० आढकम्** ( र. ९.३९ )
चारप्रस्थ; दोनशे छप्पन्न तोळे.

**आढक**–न., **मान० चतुःप्रस्थमाढकम्** ( चक. १२.९४ )
**षट्पञ्चाशदधिकद्विशततोलमानम् २५६ तोलकाः** ( र. १४.५६ )

**पात्रकापरपर्यायम्** ( र. ११.८ )
दोनशे छपन्न तोळे 'पात्रक' पर्याय शब्द.

**( आढकी )**–स्त्री., खनिज० **सौराष्ट्री** ( ध. ३.१०६ )
खनिज. तुरटी. सोरठी माती.
**वनस्पति०शिम्बीधान्य०**
( चसू. २१.२६ ध. ६.९३ )
**तद्गुणाः–कषाया, स्वादुः शीता कटुर्लघुः किञ्चिद्वातकरी, संग्राहिणी, कफपित्तघ्नी, मेदोरक्तपित्तघ्नी, लेपोपयोगिनी च, त्रिप्रकारैषा सितासितरक्तभेदात्।**
( ध. ६.९३ )
गुण–तुरट, मधुर, थंड, तिखट, लघु, थोडा वात वाढविणारी, मल घट्ट करणारी, कफपित्तनाशक, मेद रक्तपित्तनाशक व लेपाच्या उपयोगी. हिचे प्रकार ३ पांढरी, काळी व तांबडी.
NO.—PAPILIONACEAE
L—CAJANUSINDICUS
ENG.—PIGIEON PEA, DHULL
हिं. —अडहर. अरहर. तोर. ड्डमुर.
म. —तुरटी.
गु. —तुवर, डंगरी.
बं. —अडहर, आइरी.
त. —तुवरै, इयवै.
फा. —शाखुल.

**आढ्य**–वि., धनवान् ( अहृसू. १.२९ )
धनवान्, धनाढ्य, श्रीमंत, धनवंत.

**–पवन**–पु., **रोग० ऊरुस्तम्भः** ( अहृसू. १५.३६ )
मांड्या ताठरणे. एक रोग. मांड्यांची हालचाल न होणे. आढ्यवात, वातरक्त. श्रीमंतांना होणारा रोग.

**–मारुत**–पु.. **रोग० आढ्यवातः वातरक्तम्**
( अहृसू. १९.८ ) पहा "आढ्य पवन"

**–रोग**–पु., **वातरक्तम्** ( असंनि. १६.५ )
वातरक्त नामक रोग, पहा "आढ्यपवन"

**–रोगिन्**–वि., **वातरक्ती** ( अ.हृ.सू. १७.२२ )
वातरक्ताने पीडित.

**–वात**–पु., **रोग० वातरक्तम्, अयमाढ्यानां प्रायो भवतीत्याढ्यरोगः** ( चक्र) चचि. २९.११ )
पहा 'आढ्यपवन'.

**आणि**–स्त्री., **मर्म७ जानुन ऊर्ध्वमुभयतस्त्र्यङ्गुलम् आणी नाम, स्नायुमर्मैतद् वैकल्यकरं च। तत्र ( विद्धस्य ) शोफाभिवृद्धिः स्तब्धसक्थिता च** ( सुशा. ६.७ )
गुडघ्याच्या वर दोन्ही बाजूस तीन अंगुळ असलेले एक मर्मस्थल, हे स्नायुमर्म, यावर आघात झाल्याने अवयवांना विकलता येते.

**आणी**–स्त्री., **आणि मर्म** ( सुशा. ६.७ ) पहा. 'आणि'

**आण्डूक**–न., **खनिज०, वङ्गम्** ( रा. १३.१४ )
खनिज. कथिल.

**आतङ्क**–पु., **व्याधिः, दोषाः, यक्ष्म, ज्वरः**
( चनि. १.५, चवि. ६.४, चचि. ३.११ )
रोग, ज्वर, दोष, इत्यादी.

**–विपरीत**–वि., **केवलव्याधिघ्नं भेषजम्**
( चवि. २.१३ )
रोगाचे कारण जे दोष त्यांचा नाश न करिता केवळ रोगाचा नाश करणारे.

**आतत**–वि., **व्याप्तम्।** ( सुशा. ९.९ )
( सुसू. १७.५, सुनि. १२.६ )
व्याप्त. भरपूर. पूर्ण व्यापलेले. पसरलेले विस्तीर्ण त्वक्संकोचरहित.
ताणलेले. फुललेले. सुरकुत्या नाहीशा झालेले. विस्तीर्ण.

**आतप**–पु.. **सूर्यातपः, रविप्रकाशः, तेजःपरमाणुपुञ्जः,**
**तद्गुणाः–पित्ततृष्णाग्निस्वेदमूर्च्छाभ्रमास्रकृत्**
( सुचि. २४,८६ )
उन्ह. ऊन. सूर्याच्या तेजाच्या परमाणूंचा समुदाय, पुंज. गुण–पित्त, तहान. अग्नि, घाम, मूर्च्छा, भ्रम व रक्तदोष करणारे.

**–त्र**–न., **छत्रम्** ( असंशा. ८.३२ )
उन्हापासून रक्षण करणारे, छत्री, पंखा.
**लंघनप्रकारः, आतपसेवनम्।** ( चसू. १२.१८ )
**मध्यबलस्थूलमनुष्येषु स्थौल्यापनयनाय** ( चसू. १२.२३ ) **दुष्टव्रणपीडितेषु कुष्ठिषु तैलपानाभ्यङ्गादनन्तरमन्तःशोधनार्थं प्रयुक्तश्चिकित्सोपक्रमः** ( सुचि. ९.६६ )
लंघनाचा एक प्रकार.
मध्यबल स्थूल व्यक्तीची स्थूलता घालवण्यासाठी, दुष्टव्रणपीडित कुष्ठरोगी, यांना व तैलपान, अभ्यंग, करविल्यानंतर अंतःशुद्धीसाठी करावयाचा चिकित्सा प्रकार.

**–दग्ध**–परिवः **रोग० सूर्यातपादिभिः दाहः**
( सुसू. १२.३८ )
उन्हाची झळ लागणे. झळई; झळीचा ताप ( ज्वर )

**–सह**–वि., **य आतपं सहते सः** ( चसू. १३.४७ )
ऊन्ह सहन करणारा.

**–सहत्व**–न., **लक्षण० आतपसेवने क्षमत्वम्**
( चनि. १.३३ ) ऊन्ह सहन करण्याचे सामर्थ्य.

**–हत**–वि., **सूर्यतेजसा हतम्** । ( चसू. २७.३१६ )
उन्हाने बेजार झालेला. चक्कर आलेला.

**आतपासहत्व**–वि., **लक्षण० आतपस्यासहिष्णुत्वम्**
( चनि. १.३३ ) उन्ह सहन न होणे.

**आतस्य**–वि., **अतस्या इदम्** । ( चसू. २७.२९२ )
अळशीचे ( तेल इ. )

**आतुर**–वि., **रोगी.** ( चसू. १.२४, सुचि. ३३.५ )
रोगी. आजारी.

**–गुण**–पु., **रोगिणो गुणः " निर्देशकारित्वमातुरगुणानां श्रेष्ठम् "** (चसू. २५.४०) (असंसू. १३,) **द्रष्ट० ' रोगिन्. '**
रोग्याचा गुण; वैद्याची आज्ञा पालन करणे; हा गुण रोग्याच्या गुणांत श्रेष्ठ.

**आतुरावस्था**–स्त्री., **आतुरस्यावस्थारूपः कालः, स कालाकालरूपो द्विविधः कार्याकार्यविचारतः** ।
( चवि. ८.१३२ )
रोग्याची अवस्था ( काल ) कोणता उपचार योग्य किंवा अयोग्य या दृष्टीने, तो काल दोन प्रकारचा अहे.

**आतुरोपक्रमणीय**–पु., **अध्याय०** ( सुसू. ३५.१ )
अध्यायाचे नाव. कोणत्या रोग्याची चिकित्सा करावी कोणाची करू नये हे दाखविणारा.

**आतुरोपद्रवचिकित्सित**–न., **अध्याय०**
( सुचि. ३९.१ )
अध्यायाचे नांव. रोग्याला होणाऱ्या उपद्रवांची चिकित्सा सांगणारा.

**आतुर्य**–न., **आतुरस्य भावः रोगः** ( चचि. १.७९ )
रोग. आजार. अनारोग्य

**आत्त**–वि., **गृहीतम्** । ( अहसू. १.२८ )
मिळविलेले, घेतलेले, प्राप्त केलेले, प्राप्त झालेले.

**आत्मन्**–पु., **जीवः ज्ञानप्रतिसंधाता, क्षेत्रज्ञः**
( चसू. १.४२ ) ( सुशा. ५.३ )
जीव. आत्मा. ज्ञानी. क्षेत्रज्ञ, शरीरज्ञ.
**देहः** ( सुशा. ३.७ ) शरीर.
**कर्मात्मा, बद्धपुरुषः** (सुसू. १५.४१ )
देह. शरीर, आत्मा.
**जीवात्मा, मनः** ( चवि. ८.३९ )
जीव. शरीरात बद्ध झालेला जीवात्मा. मन.

**गुप्त**–न., **आत्मगुप्तायाः फलम्, कपिकच्छुः**
( सुसू. ४६.३६ )
कुहिली, खाजकुहिली–कवचबीज.

**(–गुप्ता )**–स्त्री., **वनस्पति० कपिकच्छुः**
( सुउ. ५२.४१ ) पहा ' आत्मगुप्त '.

**–गुप्तातैल**–न., **कपिकच्छुबीजभवं तैलम्**
( ध. ६.१३५ ) कवचबीजाचे तेल.

**–गुप्ताशूक**–पु., **वनस्पति० कपिकच्छोः शूकः**
( चसू. १८.४ )
खाजकुहिलीचे खाजणारे कांटे; कुसळे.

**–ज**–वि., **आत्मनो जायत इति** ( च.शा. ३.३ )
आत्म्यापासून झालेला.
न., **गर्भस्यात्मजन्यो भावः** ( च. शा. ३.१६ )
**तासु तासु योनिषूत्पत्तिरायुरात्मज्ञानं मन इन्द्रियाणि प्राणापानौ प्रेरणं धारणमाकृति–स्वर–वर्णविशेषाः सुखदुःखे इच्छाद्वेषौ चेतना धृतिर्बुद्धिः स्मृतिरहङ्कारः प्रयत्नश्चेति** ( च.शा. ३.१० )
गर्भशरिरांत आत्म्यापासून निर्माण झालेले भाव. त्या त्या योनीत जन्म घेणे. आयुष्य, आत्मज्ञान. इंद्रिये, सुखदुःख इत्यादि भाव.
**मन्मथः** ( च.चि. २.३–३० )
मदन, काम, कामदेव.

**–जा**–स्त्री., **वनस्पति० पुत्रजीवा ( चक्र )**
( च.चि. ३.२६७ ) पुत्रजीवी. वनस्पति.

**–प्रत्यक्ष**–वि. **मानसप्रत्यक्षज्ञानविषयः, सुखदुःखेच्छाद्वेषादय आत्मप्रत्यक्षाः** ( च.वि. ८.३९ )
सुख, दुःख, इच्छा, द्वेष आदि आत्म्याचे प्रत्यक्ष विषय आहेत. चिंत्य, विचार्य इत्यादि विषय मनाचे प्रत्यक्ष ज्ञानविषय आहेत.

**–रक्षा**–स्त्री., **भूतावेशनिषेधार्थं मन्त्रैरात्मनो रक्षणम्**
( चचि. २३.६१ )
भूत पिशाच्च यांपासून आपले रक्षण मंत्रांनी करणे.
**वनस्पति० इन्द्रवारुणीभेदः, महेन्द्रवारुणी,**
( ध. १.२५० ) मोठे कवंडळ, इंद्रावण.

**–लिङ्ग**–न., **स्वरूपम्** । ( सुनि. १०.३ )
आत्म्याचे स्वरूप, आपले रूप, आपले लक्षण.

**–वत्**–वि., **बुद्धिमान्** । ( सुसू. ३४.९ )
निपुण, विद्वान्, बुद्धिमान्.
**वशी, संयमी** ( सुचि. ५.१९ )
जितेंद्रिय, मन ताब्यात ठेवणारा, मनोनिग्रही.

**–विज्ञान**–न., **आत्मविद्या.** ( असंसू. ५.४२ )
आत्मज्ञान. आत्म्यासंबंधी ज्ञानशास्त्र.

**-शल्या**-स्त्री., वनस्पति० = शतावरी
(रा. ४.४३९) शतावरी.

**-संपद्**-स्त्री., **अर्थग्रहणे प्रयत्नशालित्वम्।**
(चसू. ८.४)
अर्थाचे ग्रहण करण्याकरिता प्रयत्न करण्याचा स्वभाव.
**आत्मनः चिरायुष्कारकधर्मयुक्तता**
(चशा. ६.३०)
दीर्घायुर्षी व्हावे म्हणून आयुष्यभर धर्माचरण करण्याची प्रवृत्ति असणे.
**आत्मनः शुक्रशोणितसंयोगाधिष्ठातुः शुभजीवकर्मयुक्तत्वम्।** (चशा. २.६)
शुक्रशोणित संयोगात अधिष्ठाता असलेल्या जीवाचे शुभकर्मयुक्तत्व असणे.

**-साक्षिक**-वि., **आत्मोपलभ्यमानम्** (चशा. १.८३)
आत्म्याच्या अस्तित्वाने-साक्षित्वाने प्राप्त होणारे-ज्ञात होणारे.

**-सात्म्य**-न., **आत्मनः स्वस्य सात्म्यम्**
(चवि. १.२५)
स्वतःच्या शरिरात आत्मसात् होणारे.

**आत्मोद्भवा**-स्त्री., वनस्पति० **माषपर्णी** (रा. ३.१७२)
माषपर्णी, जंगली उडीद, रान उडीद.

**आत्ययिक**-वि., **अत्ययो विनाशो भवति अस्मादिति विघातकः** (च.नि. २.११)
अत्यय- नाश ज्याच्यामुळे होतो तो (रोग), मारक, घातक.

**आत्रेय**-पु., ऋषि० **अत्रेरपत्यमात्रेयः पुनर्वस्वपरनामा, भरद्वाजशिष्यः, अग्निवेशादीनां गुरुः, भरद्वाजादायुर्वेदं प्रतिगृह्य शिष्येभ्यो दत्तवान्।** (च.सू. १.२)
अत्रीचा मुलगा आत्रेय. पुनर्वसु हे दुसरे नाव. भरद्वाजाचा शिष्य.
अग्निवेशादिकांचा गुरु. आत्रेयाने भरद्वाजापासून आयुर्वेद ग्रहण करून अग्निवेशादिकांना शिकविला.

**-भद्रकाप्यीय**-पु., अध्याय० (च.सू. २६.१)
आत्रेय, भद्रकाप्य इत्यादी अनेक आयुर्वेदज्ञांच्या मध्ये रसवीर्यादींबद्दल झालेली शास्त्रचर्चा ग्रथित केलेला अध्याय.

**-भिक्षु**-पु., ऋषि० (चसू. १.९) एक ऋषि.

**-शासन**-न., **आत्रेयस्य वैद्यकशास्त्रम्** (चसू. १.९३)
आत्रेय (पुनर्वसु) ऋषिद्वारा रचित वैद्यकशास्त्र.

**आथर्वण**-पु., वेद० **अथर्ववेदः** अथर्ववेद.



**आदंशशोफ**-पु., रोगलक्षण० **दंशस्याऽऽसमन्ताज्जायमानः शोफः।** (सु.क ४.३७)
दंशाचे भोवती उत्पन्न झालेला शोथ, सूज.

**आदर्श**-पु., **दर्पणः** (चइ. १२.७७) आरसा.
**प्रतिबिम्बदर्शनार्थं पूर्णचंद्राकारं कांस्यमयः**
(सुसू. ३०.२१)
प्रतिबिंब पाहण्याकरितां पूर्णचंद्राच्या आकाराचा काशाचा आरसा.

**-मण्डल**-पु., सर्प० **मण्डलिजातीयः**
(सुक.४.३४) (२) घणस, घोणस

**आदान**-पु., न; काल० **आददाति क्षपयति पृथिव्याः सौम्यांशं प्राणिनां च बलमित्यादानम्।**
(चसू. ६.४)
**वसंतग्रीष्मवर्षास्त्रय ऋतवः आदानकालः अस्मिन्सूर्यः प्राणिनां बलमादत्ते** (चचि. ३.४७)
जो काल आदत्ते-आददाति खातो, म्हणून सृष्टीतील सौम्यांश क्षीण होतो आणि प्राण्यांचे बलही क्षीण होते तो आदान (काल). वसंत, ग्रीष्म व वर्षाकाल हे ऋतु आदानकाल होत.
न०, **आवापः प्रक्षेपः** (सुसू. ४६.३५२)
टाकणे. आंत घालणे. मिसळणे.
**ग्रहणम्. हस्तस्य विषयः** (सुशा. १.५) घेणे हा हाताचा विषय.

**-कर्मन्**-वि., **आदानमाहारप्रणयनं कर्म यस्य स (प्राणः)** (चचि. १५.६)
आहार गिळणे, आहाराची मागणी करणे, हे कर्म असलेला (प्राण)

**आदानी**-स्त्री., वनस्पति० **घोषकभेदः।**
(चशा. ४.८७) मोठे घोसाळे.

**आदारिबिम्बी**-स्त्री., वनस्पति० **आदारशिम्बी, आलिः आउलिः** (डसुउ. ४४.१९) 'आदारी' पहा.

**आदारी**-स्त्री., वनस्पति० **वेल्लान्तरसदृशपुष्पा लोहितफला, आलिः** (डसुउ. ४४.१९)
आलि नावांची वनस्पति.
वनस्पति० **'आदारी काकहन्ताळी तोया खदिरवल्यपि'** (इन्दु) असंउ. १ पृ. ४)
काक हन्ताळी, तोया, खदिरवल्ली ही दुसरी नावे.

**आदि**-पु., **कारणम्, उत्पत्तिः** (सुशा. १.४)
कारण, उत्पत्ति, जन्म.

**-काल**-पु., **कृतयुगम्** (चचि. १९.४)
कृतयुग, सत्ययुग.

**–देव**–पु., शङ्करः ब्रह्मादिर्वा ( सुसू. १.२१ )
महादेव=शंकर अथवा ब्रह्मा आदि

**–बलप्रवृत्त**–वि., शुक्रशोणितस्थितदोषजनितः तेऽपि द्विविधा मातृजाः पितृजाश्च ( सुसू. २४.५ )
शुक्र व शोणित यात असलेल्या दोषांनी उत्पन्न झालेले ( विकार ) ते दोन प्रकारचे. मातेपासून व पित्यापासून झालेले.

**–मधु**–न., पुराण मधु ( र. १७.६२–६४ )
जुना–पुराणा मध.

**–वन्ध्या**–स्त्री., वन्ध्याभेद० आजन्मवन्ध्या, पापकर्मविनिर्मिता ( र. २२.१–२ ) जन्मतः वंध्या.

**आदित्य**– पु., देवता० रविः, असावेव स्वरश्मिभिः शीतोष्णवर्षाः गतिविशेषेण कालविभागं च कुरुते ( सुसू. ६.४ )
सूर्य. एक देवता. गतिविशेषाने आपल्या किरणांच्या प्रभावाने शीत, उष्ण आणि वर्षा असा कालविभाग करणारी देवता.
**पुरा द्वादश आदित्या आसन्, इन्द्रो भगः पूषाऽर्यमा मित्रावरुणौ धाता विवस्वानंशो भास्करस्त्वष्टा विष्णुरिति, तेषां त्रयोदशो गुहोऽभवदहस्पतिर्नाम ।**
पूर्वी इंद्र, भग इ० १२ आदित्य होते. पुढे गुह नावाचा तेरावा आदित्य झाला. अहस्पति हे त्याचे नांव.
( का. रेवतीकल्प ६. पृ. १८८ )

**–कान्ता**–स्त्री., वनस्पति० आदित्यभक्ता ( ध. ४.९८ ) आदित्यभक्ता, हुरहुर, सूर्यमुखी

**–पर्णिनी**–स्त्री., वनस्पति० सोमसमवीर्यौषधिः तदुत्पत्तिस्थानं देवसुंदह्रदः सिंधुनदश्च ।
सोम या वनस्पतीसारखी वीर्यवान् औषधि. उत्पत्तिस्थान देवसुंद नावाचा ऱ्हद आणि सिंधुनद.
**कालः वसन्तर्तुः** ( सुचि. ३०–३१ )
हिचा काल, वसंत ऋतु
**एषां मूलिनी, सुरक्तांशुककोमलैः पञ्चभिः पत्रैर्युक्ता, आदित्यानुवर्तिनी, कनकाभा, जलान्तेषु सर्वतः परिसर्पिणी च** ( सुचि. ३०.१९–२० )
ह्यांपैकीं मुळे असलेली सोम तांबुस रंगाची कोवळी पांच पाने असलेली असते. आदित्यानुवर्तिनी नांवाची सोम सुवर्ण रंगाची असते. जलप्रदेशात सर्वत्र होते.

**–पर्णी**–स्त्री., वनस्पति० आदित्यपर्णिनी सूर्यावर्तः (चक्र) ( चचि. २६.२६८ ) सूर्यफुली.
**सूर्यकान्ता, सूर्यवल्ली** ( चचि. १. (४) ७ )
एक वेल.
**आदित्यानुवर्तिनी** ( सुचि. ३०–३१ )
सूर्यफुली. सूर्याच्याकडे वळणारी.

**–भक्ता**–स्त्री., वनस्पति० सुवर्चला सूर्यमुखी तद्गुणाः–कटुस्तिक्तोष्णा, ( शीता. रा. ) स्वर्या, कफघ्नी, स्फोटत्वग्दोष–कण्डू–व्रण–कुष्ठ–भूत–ग्रह–शीतज्वरघ्नी च ( ध. ४.९९ )
N.O. COMPOSIEAE
( NAD. VOL. I/614 )
L.—HELIANTHUS ANNOUS LINN.
हिं.—सूरजमुखी
म.—सूर्यफूल, सूरजमुखी
गु.—सूरजमुख
बं.—सूरजमुखी
त.—आदित्य भक्तिचेट्ठु
फा.—गुली अफताब
सूर्यफूल–गुण–तिखट, कडु, उष्ण, स्वराला, हितकर, कफनाशक, फोड, त्वचेचे दोष, खाज, व्रण, कुष्ठ, भूतग्रहबाधा व थंडीतापनाशक.

**–वल्ली**–स्त्री., वनस्पति० आदित्यभक्ता ( ध. ४.९८ )
पहा ' आदित्यभक्ता '

**आदिम**–पु., कश्चिद्रससिद्धिप्रदायकः सिद्धः ( र. १.२–५ )
एक सिद्ध; पाऱ्याच्या क्रियात सिद्धि प्राप्त करून देणारा.

**आदृत**–वि., सादरः ( सु.क १.२४ )
आदरयुक्त, आदराचा.

**आदेयवाक्य**–वि., ग्राह्यवचनः ( ग्राह्यं वचनं यस्येति ) ( चशा. ४.३७–३ )
ज्याचे वचन ग्राह्य असते असा.

**आद्य**–न., अन्नम् । ( चसू. ६.५० )
खाण्यासारखे, खाण्याचे, अन्न.

**आध्मत**–वि., आध्मायमानः ( चसि. २.१२ )
वायूचा अवरोध झाल्याने फुललेले पोट.

**आधान**–न., स्थापनम् । ( असंनि. १.२१ )
स्थापना. स्थापन करणे.

**आधार**–पु., औषधिधारणार्थं नेत्रगोलकाद्बहिः माषपिष्टकृता पाली ( असंसू. ३३.४ )

औषध रहावे म्हणून डोळ्याच्या भोंवती उडदाच्या पिठाची केलेली पाळी.

**कफामपित्तपक्वादीनामाशयोऽधिष्ठानं वा ।** ( अहृशा. ३.१० )

कफ, आम पित्त, पक्व इत्यादींचा आशय किंवा अधिष्ठान.

**आधारी**—स्त्री., वनस्पति० **गुडूची, शतावरी** ( र. १७.४३–४६ ) गुळवेल. शतावरी.

**आधि**—पु., **मनोव्याधिः** । ( असंउ. ९. ( पृ. ७३ )
मनाचे व्याधी—मानसिक विकार.

**आधिदैविक**—वि., **देवेष्वधिकृत्य यद्वर्तते तदाधिदैविकम्** ( सुसू. २४.४ )

देव, गंधर्व, पिशाच, वीज, इत्यादि दैवी कारणांनी होणारे विकार.

**आधिभौतिक**—वि., **भूतेष्वधिकृत्य यत्प्रवर्तते तदाधिभौतिकम्** । ( सुसू. २४.४ )
भूत म्हणजे प्राणी. त्यांच्याकडून होणारे, शस्त्रांनी किंवा व्याघ्र सर्प इत्यादिकांकडून होणारे ( रोग. )

**आध्मात**—वि., **आध्मानयुक्तपुरुषः** । ( असंसू. २७.१० )
**वातपूर्णम्** । ( सुनि. १.८८ )
वायूने भरलेले. पोट फुगलेला.

**–कन्धर**—वि., **समन्ताद्ध्माता कंधरा ग्रीवा यस्य** ( अहृउ. ७–१० )

सगळ्या बाजूने फुगलेल्या मानेचा.

**–ग्रीव**—वि., **पूरितस्तब्धग्रीवः** । ( चनि. ८.८ )
स्तब्ध व फुगलेल्या मानेचा.

**आध्मान**—न., **रोगलक्षण० उदरे वायोरतीव संचयः अनिलपूरणम्** । ( चसू. २६.१०२ )
रोगाचे लक्षण. पोटात वायूचा अतिशय संचय होणे.
**वातरोग०, वातनिरोधाद्यदा उदरमतीवाऽऽध्मातमत्युग्ररुजं साटोपं च भवति तं रोगमाध्मानमिति विद्यात्** ( सुनि. १.८८. )
**वाग्भटे 'आनाह' इत्यस्य संज्ञा** ( अहृनि. ११.६० )

एक वात रोग. यात वाताच्या अवरोधाने अति पोट फुगणें, अतिशय तीव्र शूळ, गुडगुड इ. लक्षणे होतात.

वाग्भटात याला 'आनाह' म्हटले आहे.

**अस्य चिकित्सा—लंघनं, पाणितापः ( स्वेदनं ) फलवर्तिक्रिया पाचनीय–दीपनीय,–बस्तिप्रयोगाः लङ्घनानन्तरमन्नकाले जीरकादि–दीपनसिद्धान्यन्नानि च देयानि** ( सुचि. ५.२६ )
याची चिकित्सा—लंघन. हात ऊन करून त्यांनी पोट शेकणे, देवडांगरी सारख्या फळाची वात गुदात घालणे, पाचन, दीपन औषधे, बस्ति ( मलहर ) देणे; लंघनानंतर जिरे इ. अग्निदीपक द्रव्ये घालून केलेले अन्न द्यावे.

**आध्मापन**—न., **आध्मानम्** (चसि. १.३३) पोट फुगणे.

**आध्यात्मिक**—वि., **आत्मसंबद्धम्, आत्मन्यधिकृत्य वर्तत इति.** ( सुसू. २४.४ )
आत्मा म्हणजे समनस्क शरीर. वातपित्तकफोद्भव शारीरिक आणि रजस्तमोजन्य मानसिक रोग हे आध्यात्मिक विकार होत.

**आनडुह**—वि., **वृषभस्येदम् ( चर्मादि )** ( चशा. ८.१० )
बैलाचे जे चामडे, रक्त, मांस, इत्यादि ते.

**आनद्ध**—वि., **आनाहयुक्तम्, आध्मातम्** ( सुउ. २४.६ )
आनाहयुक्त, फुगलेले.
**आच्छादितम्** ( सुसू. ६.३१ )
आच्छादिलेले, झांकलेले.

**–बस्ति**—वि., **रोगलक्षण० आध्मातमूत्राधारः** ( सुउ. ५५.१० )

एक रोग लक्षण. फुगलेला भरलेला मूत्राशय.

**–बस्तिता**—स्त्री., **बस्तिप्रदेशेऽत्याध्मानम्** ( सुशा. ९.१२ )

बस्तिप्रदेशात अतिशय फुगवटी असणे.

**आनन**—न., **शारीर० मुखम्** । ( असंशा. ८.३० )
तोंड, मुख.
**मुखकुहरम्**—तोंडाचे विवर, पोकळी.

**–दूषिक**—पु., **क्षुद्ररोग० मुखदूषिका** ( र. २५.२ )
तोंडावरच्या पुळ्या. तारुण्यपिटिका.

**आनन्द**—पु., **कामः** ( सुशा. १.५ )
मदन. जननेंद्रियाचा विषय.

**–भैरव**—पु., **सिद्धयोग० त्रिदोषजातिसारघ्नः** ( र. १६.७–१० )

त्रिदोषज अतिसारनाशक एक औषध.

**( –भैरवी )**—स्त्री., **सिद्धयोग० इयमश्मरीं हन्ति** । ( र. १७.१२.–१३ ) अश्मरीनाशक सिद्धयोग.

**–भैरवघृत**—न., **सिद्धयोग० त्वग्वातघ्नमिदम्** ( र. २१.१७०–७१ )

त्वचेत कुपित झालेल्या वाताचे शमन करणारे सिद्ध तूप.

**आनाम**–पु., आनमनम्, वक्रीकरणम् (सुचि. ३३.४६) वांकवणे, वांकडे करणे.

**आनाह**–पु., स्थौल्यम्, परिणाहः (अहृसू. २५.१४) स्थूलता, घेर वाढणे, फुलणे.

**रोगलक्षण० उदरस्याध्मानम् वायुना परीपूरणम् ।** (चवि. २.७)

रोगाचे लक्षण, पोट फुगणे, वाताने पूर्ण भरणे.

**रोग० तस्य संप्राप्तिः–क्रमेण निचितमामं शकृद्वा भूयो विगुणानिलेन (उन्मार्गवायुना) विबद्धं सद् यथामार्गं न प्रवर्तते, स आनाहः** (सुउ. ५६.२०–२१)

**"यस्य वातः प्रकुपितः कुक्षिमाश्रित्य तिष्ठति । नाधो व्रजति नाप्यूर्ध्वमानाहस्तस्य जायते ॥"** (चसू. १८.३२)

**स आमसमुद्भवः पुरीषजश्च, आमसमुद्भवे तृष्णा, प्रतिश्यायः, शिरोविदाहः, आमाशये शूलमामाशयगुरुत्वमुत्क्लेशनमुद्गारविघातनं चेति लक्षणानि** (सुउ. ५६.२१–२२)

**पुरीषजानाहलक्षणानि–कटि–पृष्ठ–पुरीष–मूत्राणां स्तंभशूलौ, श्वासः, कुक्ष्यानाहः विड्वमनं, वातवर्चोनिरोधः, तृष्णोद्गारावरोधः कुक्षौ निरुद्धवायोरुपरिधावनम्** (सुउ. ५६.२२–२३)

**बालानामानाहरोगे लक्षणानि–विशालस्तब्धनयनता पर्वभेदोऽरतिः क्लमो मूत्रानिलविट्रोधश्च** (कासू. २५.१९)

**वंक्षणाश्रये आनाहे लक्षणम्–वंक्षणप्रदेशे संनद्धवातादिवत्** (चचि. १४.१३३)

**सामान्यचिकित्सा—स्वेदनपाचने गुदे वर्तिनिवेशनं नाड्या चूर्णप्रधमनं निरूहानुवासनबस्तिश्च ।** (सुउ. ५६.२४–२५)

एक रोग. संप्राप्ति–सांचलेला आम किंवा मळ वर जाणाऱ्या दुष्ट वायूने दाट व घट्ट होऊन गुदद्वाराने बाहेर जात नाही त्यामुळे फुगलेले पोट म्हणजे आनाह. प्रकुपित वात कुशीत राहून खाली सरत नाही व वरही जात नाही त्या फुगलेल्या पोटाला आनाह म्हणतात. याचे दोन प्रकार; आमज व मळाचा. आमाच्या आनाहात तहान, पडसे, डोळ्याची आग. आमाशयात शूल, जडपणा, घशाशी पित्त येणे, ढेकर, अपुरे येणे. मळाच्या आनाहात लक्षणे–कंबर पाठ ताठरणे, मळमूत्र यांचा अवरोध, शूल, श्वास, कुशी फुगणे, ओकारीत विष्ठा येणे, मळ वात यांचा अवरोध, तहान, ढेकर अर्धवट येणे, कुशीत वायु वर वर चढतो व इकडे तिकडे संचार करतो. **मुलाच्या पोटफुगीची लक्षणे**–डोळे मोठे व ताठरलेले असणे, पेऱ्यात फूट, बेचैनी, थकवा, मळ, मूत्र, वात यांचा अवरोध–**ओटीपोटात फुगवटीची लक्षणे**–ओटीपोटात वात मळ मूत्र यांचा अवरोध. **सामान्य उपचारः**–घाम काढणे, शेकणे, पाचक औषध देणे, गुदात औषधी वाती घालणे, नळीने चूर्ण फुंकणे, शोधक व स्नेहबस्ति देणे.

**आनील**–न., खनिज० वङ्गम् (ध. ६.१३) कथील.

**आनुपूर्वी**–स्त्री., क्रमः परिपाटी (सुउ. ६५.२९) क्रम, अनुसार, परिपाटी, अनुक्रम.

**आनुबन्धिक**–वि., अनुबध्नाति, जन्मान्तरेऽप्यनुगच्छतीति । (चवि. ८.३७)

संबंध ठेवणारा, मागचे बंधन असणारा. दुसऱ्या जन्मातही मागे जाणारा.

**आनुलोमिक**–वि., अनुलोमत्वकरम् (अहृसू. १९।४७.४८)

अनुलोमन करणारा. स्वाभाविक मार्गाने जाण्याची प्रवृत्ति निर्माण करणारा. घालवणारा.

**आनुलोम्य**–न., प्रवर्तकत्वम् । (सुनि. १.१०) योग्य मार्गाने करणे योग्य मार्गाने घालवण्याचा धर्म.

**आनुवासनिक**–वि., अनुवासनबस्तावुपयुक्तम् (स्नेहादि) (चचि. ३.२५१)

अनुवासन बस्तीला उपयुक्त द्रव्ये (स्नेह इ.)

**आनूप**–वि., अनूपसंश्रयादानूपः (चसू. २७.५४) जलभूयिष्ठ देशात रहाणारा जो तो आनूप.

पु., जलभूयिष्ठो देशः जलभूयिष्ठ देश.

**तल्लक्षणम्–तत्र बहूदकनिम्नोन्नतनदीवर्षगहनो मृदुशीतानिलो बहुमहापर्वतवृक्षो मृदुसुकुमारोपचितशरीरमनुष्यप्रायः कफवातरोगभूयिष्ठश्चानूपः** (सुसू. ३५.४२)

**हिन्तालतमालनारिकेलकदलीवनगहनः सरित्समुद्रपर्यन्तप्रायः शिशिरपवन बहुलोवञ्जुलवानीरोपशोभिततीराभिः सरिद्भिरुपगतभूमिभागः** (चक. १.८)

**अहितदेशानां श्रेष्ठः ।** (चसू. २५.४०)

ज्या प्रदेशात मोठे पर्वत उंच–सखल असे विषम जलाशय, नद्या, पाऊस, झाडी पुष्कळ आहेत. मृदु व थंड वारा सतत वहातो, ज्यात शिंदी, तमाल, नारळ, केळ यांची वने भरपूर आहेत. बोरु, वेत,

अशोक, तिवस यांनी तीर भरलेल्या नद्या व समुद्र असून ज्यात मृदु सुकुमार पुष्ट शरिराचा मानव आहे, कफवातदोषभूयिष्ठ रोग अधिक होतात तो प्रदेश आनूप होय.

**–पिशित**–न., **आनूपप्रदेशस्थप्राणिनां मांसम्** (चसू. ५.५)
आनूप देशात रहाणाऱ्या प्राण्यांचे मांस.
**स च पञ्चविधः–कूलचराः, प्लवाः, कोषस्थाः, पादिनो मत्स्याश्च** (सुसू. ४६.९३)
प्रकार पांच– १ पाण्याच्या काठाशी संचार करणारे, २ पाण्यात तरंगणारे, ३ कोशात रहाणारे शंख इत्यादि, ४ मासे ५ पाय असणारे.

**–भूमि**–स्त्री., **आनूपदेशः, आनूपभूमिः अहितदेशानां श्रेष्ठा** (असंसू. १३.३)
सर्व अहितकर देशात आनूप देश श्रेष्ठ.

**–मज्जा**–स्त्री., स्नेह० **महिषादीनां मज्जा; तस्याः गुणाः–मधुरा, गुर्वी, उष्णा, वातघ्नी च** (सुसू. ४५.१३१)
म्हैस इत्यादी प्राण्यांची मज्जा गुण–मधुर, जड, उष्ण, आणि वातनाशक.

**–मांस**–न., **आनूपदेशचारि प्राणिजं मांसम् तद्गुरूष्ण-स्निग्धमधुरं बलोपचयवर्धनं वृष्यं वातहरं कफपित्त-वर्धनं व्यायामदीप्ताग्निभ्यो हितम्** (चसू. २७.५७)
आनूप देशातील प्राण्यांचे मांस शक्ति व शरिराची वाढ करणारे. **त्याचे गुण**–गुरु, उष्ण, स्निग्ध, मधुर, शुक्रवर्धक, वातनाशक, कफपित्त, वाढवणारे, व्यायाम करणारे व ज्यांचा जठराग्नि प्रदीप्त आहे अशांना हितकर.

**–वर्ग**–पु., **आनूपदेशवासिप्राणिवर्गः** (सुसू. ४६.९३)
आनूपदेशातील प्राण्यांचा वर्ग; समूह.

**–वारि**–न., **आनूपदेशस्थं जलम्, तदनेकदोषम-भिष्यन्दि गर्हितं च** (सुसू. ४५.३७)
आनूप देशातील पाणी; अनेक दोष निर्माण करणारे व शरिरातील धातु अधिक आर्द्र करणारे आणि सेवन करण्याला अगदीं अयोग्य– टाकाऊ आहे.

**–शफ**–पु., **महिषादीनां खुरः।** (सुचि. १.९२)
म्हैस इत्यादि प्राण्यांचे खूर.

**आनृतिकत्व**–न., **राजसगुण०, मिथ्यावचनशीलता** (सुशा. १.१८)
खोटे बोलण्याचा स्वभाव; खोटेपणा,

**आनृशंस्य**–न., **सात्विकगुण० अक्रूरकर्मकारित्वम्** (सुशा. १.१८) दयायुक्त कार्य करण्याचा धर्म.

**आन्तरिक्ष**–वि., **आकाशीयभावः आकाशभूतगुणः आन्तरिक्षास्तु–शब्दः शब्देन्द्रियं सर्वच्छिद्रसमूहो विविक्तता च.** (सुशा. १.१९)
आकाश–संबंधी, आकाश महाभूताचे गुण० शब्द, शब्देंद्रिय, शरिरातील पोकळी आणि प्रत्येक घटकाचे भिन्नत्व हे आकाश महाभूताचे गुण होत.
वि., **आकाशभूयिष्ठम्।** (चशा. ७.१६)
आकाश महाभूताच्या गुणांचे आधिक्य असलेला.
वि., **अन्तरिक्षादागतम्, मेघोदकम्, उदकानां श्रेष्ठम्।** (सुसू. ४५.३ चसू. २५.४०)
आकाशातून पडलेले पाणी. पावसाचे पाणी. सर्व पाण्यात पिण्याकरिता श्रेष्ठ आहे.

**आन्तरीक्षानुकारिन्**–वि., **यदन्तरीक्षमनुकरोति स्वच्छ-त्वादिभिर्गुणैः।** (असंसू. ६)
स्वच्छता इत्यादी गुणांनी जे पावसाच्या पाण्याची बरोबरी करील ते; झरा इत्यादिकांचे पाणी.

**आन्ध्य**–न., **नेत्ररोग० अन्धत्वम्, लिङ्गनाशः** (सुशा. ६.२७ असंउ. १७) आंधळेपणा. दृष्टिनाश.

**आन्ध्र**–पु., **दाक्षिणात्यजनपदविशेषः** (असंशा. १२.१९)
मद्रासच्या उत्तरेस व ओरिसाच्या दक्षिणेस बंगालच्या आखाताला लागून असलेला प्रदेश.

**आपगा**– स्त्री., **नदी** (सुचि. ३०.३९)
जिच्यातून पाण्याचा प्रवाह सारखा वाहात असतो ती–नदी.

**आपद्**–स्त्री., **संकटम्, व्याधिः।** (चसू. १५.३)
संकट, रोग. आपत्ति.

**आपन्न**–वि., **प्राप्तम्** (चशा. ४.९)
प्राप्त झालेला, मिळालेला.

**–गर्भा**–वि., **लब्धगर्भा, गर्भिणी** (असंशा. ४.३)
पोटांत गर्भ असलेली गर्भिणी.

**–सत्वा**–स्त्री., **लब्धगर्भा, गर्भिणी** (सुउ. ४९.४–५)
जिने निराळा जीव प्राप्त केला आहे अशी. गर्भिणी.

**आपमार्ग**–पु., **वनस्पति० अपामार्गः** (र. २५.८६)
आघाडा.

**आपाकशाक**–न., **वनस्पति० आर्द्रकम्** (ध २.८५)
आले, ओली सुंठ.

**आपातभद्र**–वि., **आपाततः कल्याणकारी** (चवि. १.१६)

तावडतोब कल्याण करणारा.

**आपान**–पु., **धूमस्याक्षेपविसर्गौ** ( चसू. ५.३६ )
धूर पिणे आणि सोडणे, धूम्रपान.
न., **पानम्, मद्यपानम्** ( चचि. २४.७५ )
मद्य–दारू पिणे.
**तत् सात्विक – राजस – तामसभेदात् त्रिविधम्** ( चचि. २४.७५–७८ )

**आपिञ्जर**–न., **खनिज० सुवर्णम्** ( रा. १३.२ )
सोने.

**आपीत**–पु., **वनस्पति० नन्दीवृक्षः** ( ध. ३.१८ )
नांदरुखी.
न., **खनिज० स्वर्णमाक्षिकम् द्रष्टव्यं ' माक्षिक '** ( रा. १३.२०९ ) सुवर्णमाक्षिक.
न., **वनस्पति० पद्मकेसरम्** ( ध.४.१६५ )
कमळातील केसर.

**आपोथन**–न., **विश्लेषणम्** (सुचि. ३.५२ )
विश्लेषण करणे, पृथक् करणे, पृथक्करण.
**प्रहरणम्** ( चचि. १.१४७ )
प्रहार करणे, ठोकणे, मारणे, आघात करणे, झोडणेप.

**आपोथिताग्र**–वि. **ईषत्क्षुण्णाग्रम्** ( चसू. ५.७१.७२ )
जिचे टोक ठेचलेले आहे व अग्रभागाचा कुंचला बनविलेली. ( दंतधावनाची काडी )

**आप्त**–वि., **यथार्थवक्ता, अवितर्कस्मृतिविभागविद् निष्प्रीत्युपतापदर्शी** ( चवि. ४.४ )
जसे असेल तसे बोलणारा. सत्यवादी. निश्चित व संपूर्ण ज्ञान असलेला, प्रेम किंवा द्वेष ह्या परस्पर विरुद्ध भावनांच्या आहारी न जातां योग्य ते दाखविणारा, वास्तवदर्शी.
**यथार्थम् ( चक्र )** ( चवि. ८.८२ )
योग्य, जसेच्या तसे.
**–वचन**–न., **आप्तोपदेशः** ( चवि. ४.४ )
आप्ताने सांगितलेला उपदेश, आप्ताचे विधान.

**आप्तागम**–पु., **वेदः शास्त्रवादः** ( चसू. ११.२७ )
वेद. शास्त्रवचन. शास्त्र.

**आप्तास्थित**–वि., **आप्तैराश्रितम्** ( सुसू. ४६.४४६ )
आप्त जेथे असतात ते. आप्तांच्या ताब्यात असलेले.

**आप्तोपदेश**–पु., **ऐतिह्यम् आप्तवचनं वेदादिः** ( चवि. ८.४१ ) आप्ताचे वचन; वेदवचन.
**–आनु**–वि., **आप्तस्योपसेवकः आप्तवचनानुकारी-** ( असंसू. ५.४६ )
मानणारा, आप्तवचनाला अनुसरणारा.

**आप्ति**–स्त्री., **संप्राप्तिः** ( अहृसू. १.२२ )
रोगाचे कारण निर्माण झाल्यापासून रोग निर्माण होईपर्यंत झालेले वातादि दोषांचे व्यापार.

**आप्य**–वि., **जलीयम्** ( सुशा. १.१९ )
जलीय तत्व, जलतत्व.
**पाञ्चभौतिकमपि जलगुणभूयिष्ठम्** ( चसू. २६.११ )
पांचभौतिक द्रव्य असून जे जलमहाभूताचे गुण उत्कटत्वाने व्यक्त करते ते. ( द्रव्य ).
**यद् द्रवसरमन्दस्निग्धमृदुपिच्छिलं रसरुधिरवसा-कफपित्तमूत्रस्वेदादि तदाप्यं रसो रसनं च अब्धातु-प्रधानम्।** ( चशा. ७.१६ )
जे द्रव, सरणारे, मन्द, स्निग्ध, मृदु, बुळबुळीत ह्या गुणाचे रसादि धातु ते आप्य होत.
रसधातु व रसनेंद्रिय आप्य च होत.
**आप्यास्तु–रसो रसनेन्द्रियं सर्वद्रवसमूहो, गुरुता, शैत्यं, स्नेहो, रेतश्च** ( सुशा. १.१९ )
शरिरातील रसधातु, रसनेन्द्रिय, सर्व द्रवधातु, गुरुता, शीतता, स्नेह आणि शुक्र हे आप्य धातु होत.

**आप्यायन**–न., **वर्धनम्** ( सुसू. १.८. ( ८ )
शरिराचे वर्धन. वाढ–पुष्टि.

**आप्यायनक**–न., **घटयन्त्रम् रसस्य बलकारकम्** ( र. ९.५१ )
पारदाला कार्य करण्याला समर्थ करणारे यंत्र. घटयंत्र.

**आप्यायमान**–वि., **पुष्यमाणम्।** ( असंसू. ४.७ )
पुष्ट होणारे. पुष्ट–पुष्ट केला जाणारा.

**आप्लावन**–न., **द्रवम्, द्रवद्रव्यम्** ( चशा. ८.४१ )
पातळ–प्रवाही द्रव्य, द्रव पदार्थ.
**भावना, मूत्रादिभिर्द्रव्याणां भावनम्** ( सुसू. ४४.८४–८५ )
मूत्रादिकांची भावना औषधाला देणे.

**आप्लुत**–वि., **व्याप्तम्** ( चइं. १०.१४ )
व्याप्त, पूर्ण, भरलेले.
**मिश्रितम्, पूर्णम्** ( सुचि. ८.३० )
भरपूर मिसळलेले. पुरेपूर.

**आफोट**–पु., **वनस्पति० आस्फोटः अर्कभेदः** ( काखि. १५.१७ )
आफोटी. रुई, रुईचा प्रकार.

**आबाध**–पु., **शारीरो मानसो वा व्याधिः** ( सुसू.२४.१२ )
शारीर किंवा मानसिक व्याधी.

**पीडा** ( सुसू. ४६.४३८–३९ )
पीडा, त्रास, व्यथा, वेदना.

**( आबाधा )**–स्त्री., **पीडा** ( सुचि.२४.१ )
त्रास, व्यथा, वेदना.

**–वर्जन**–न., **मर्मोपघातकहेतुवर्जनम्** ( चसि. ९.१० )
मर्मावर आघात करणारे कारण वर्ज करणे–टाळणे.

**आभरण**–न., **भूषणम्, पोषणम्** (असंसू. ८.४४ )
आभूषण, पोषण, डागिना, अलंकार.

**आभा**–स्त्री., **वृक्ष० बब्बूलः ( बर्बुरः )**
( र. २३. ४३–४४ )
बाभूळ वृक्ष.

**आभास**–पु., **पारदबन्ध०, योगयुक्तः पारदः पुटनानन्तरं भावनानन्तरं च यदा विमुक्तो भूत्वा स्वभावं याति तदाऽनेन शब्देन व्यवह्रियते** ( र. ८.१७ )
**पुटितो यो रसो याति योगं मुक्त्वा स्वभावताम् ।**
**भावितो धातुमूलाद्यैराभासो गुणवैकृतैः ॥**
( र. ११.६८ )
निरनिराळ्या गुण प्रकारांनी युक्त अशा धातूंनी व मुळे वगैरेंनी भावना देऊन पुटे दिल्यानंतर योगात असलेला जो पारा योगातून पृथक्‌ होऊन स्वाभाविक अवस्थेत येतो त्याला आभास म्हणतात.

**आभिप्रायिक**–वि., **अभिप्रायप्रयोजकम्, इष्टम्**
( चशा. ८.५० )
इष्ट, प्रिय, मनात ठरविलेले.

**आभीर**–पु., **कुरुक्षेत्राद्दक्षिणां दिशमाश्रितो देशः; गुर्जरदेशस्य दक्षिणपूर्वभागस्थो नर्मदामुखप्रदेशः ।**
( काखिल. २५.१४ )
कुरुक्षेत्राच्या दक्षिणेस गुजरातच्या दक्षिणपूर्व भागात नर्मदेच्या मुखाजवळील प्रदेश.

**आभुग्न**–वि., **ईषज्जिह्मम्, कुब्जीभूतम्**
( सुनि. १५.१० )
वाकडा झालेला, थोडा कुबडा झालेला–वाकलेला.

**–शिरस्**–वि., **संकुचितं शिरः यस्य स आभुग्नशिराः गर्भः** ( सुनि. ८.५ )
ज्याचे डोके वाकले आहे असा गर्भ. डोके संकुचित झालेला गर्भ.

**–सक्थी**–वि., **मूढगर्भ० यस्य आभुग्ने संकुचिते सक्थिनी जङ्घे सः** ( सुचि. १५.९ )
एक मूढगर्भप्रकार, ज्याच्या मांड्या संकुचित झाल्या आहेत असा ( गर्भ ).

**–सक्थी**–वि., **यस्याः जानुमध्ये सक्थिनी संकुचिते सा** ( सुशा. १०.८ )
जिने मांड्या गुडघ्यामध्ये संकुचित केल्या आहेत–आखडून घेतल्या आहेत अशी.

**आभोग**–पु., **परिपूर्णता, प्रमाणं, विस्तारः परिधिर्मध्यभागः ।** ( र. १०.३४–३९ )
परिपूर्ण, घेर, मधला भाग, विस्तृत प्रमाण.

**आभ्यन्तर**–वि., **शरीरान्तर्वर्ति ।** ( सुउ. २३.५ )
शरिरामध्ये असणारा मार्ग.
पु., **शारीर० महास्रोतः** ( असंसू. २२.१५ )
तोंडापासून गुदापर्यंतचा आंतला मार्ग. महास्रोतस.

**आम**–वि., **अपक्वम् ।** ( सुसू, ४६,२०९ )
कच्चे, अपक्व. ( फळ )
**अशृतम्, अक्वथितम् ( पयः स्नेह इ० )**
( चनि. २.४ )
न शिजवलेले ( अन्न ). न उकळलेले ( दूध, तूप, पाणी ) इ०.
पु., **जठरानलदौर्बल्यादामाशयगतोऽपक्वोऽन्नरसः ।**
( अहसू. १३.२५ )
पाचकाग्नीच्या दुर्बलतेने न पचलेला असा आमाशयात प्राप्त झालेला जो अन्नरस त्याला आम म्हणतात.
**धात्वग्निदौर्बल्यादधातुस्थितोऽपक्वोऽन्नरसः धात्वग्निभिरपाकादामः** ( सुसू. १५.३२ ( डल्हण )
धात्वग्नींच्या दुर्बलतेमुळे न पचलेला व धातुस्वरूपाला न पोचलेला असा अन्नरस आम होय.
**कोद्रवेभ्य उत्पन्नविषस्येव अतिदुष्टदोषाणामन्योन्यसंमूर्च्छनादुत्पन्नो आमः** ( अहसू. १३.२६ )
कोद्रु या धान्यापासून जसे विष निर्माण होते तशी अतिशय दुष्ट झालेल्या दोषांच्या परस्पर मिश्रणापासून आमरूपी विषाची उत्पत्ति होते.
**मलसंचयः प्रथमा दोषदुष्टिर्वा**
( चचि. १५.९३ ( चक्र )
मलसंचय अधिक होणे. दोषांची प्रथम दुष्टि.
**आमस्वरूपम्–गुरु, अनेकवर्णं, स्निग्धं, बहुपिच्छिलं तन्तुमद्, दुर्गन्धं, द्रवरूपम् ।**
( अहसू.१३.१७ ( अरुणदत्त )
**आमाशयाचे स्वरूप**:–जड, अनेक रंगांचा, स्निग्ध, फार बुळबुळीत, तंतु असलेला, दुर्गंधी, पातळ ( मल )

**आमावस्था—आमसंपृक्ता दोषा दूष्या रोगाश्च सामाः, आमवियुक्ता निरामा इत्युच्यते ।** ( अहृसू. १३.२७ )
आमाने भरलेले–आमाने युक्त दोष, दूष्य–धातु आणि रोग साम होत. आमविरहित जे ते निराम म्हटले जातात.
**रोग० विंशतिकफरोगेष्वेकः** ( कासू. २७.४१ )
**स द्विविधः-विसूचिका अलसकश्च** (चसू. १९.३)
**दण्डालसकविलम्बिकारोगावामजन्यौ** ( अहृसू. ८.१३–२८ )
कफाच्या वीस रोगांपैकी एक. प्रकार दोन–विसूचिका व अलसक. दंडालसक विलंबिका हे रोगही आमजन्यच होत.

**–कोशिन्**–वि., **आरूढकर्णस्य वर्धनेन जायमानोऽयं दोषः, असम्यग्रूढमध्यकर्णः** ( सुसू. १६.२४ )
कानाच्या वाढवावयाच्या मध्यभागात केलेली जखम पूर्ण न भरता जर पुढील क्रिया केली तर कान तुटतो ती स्थिति ज्याचा मध्य भाग चांगला रुजला नाही असा कान.

**–गन्धास्यत्व**–न., **रोगलक्षण० रक्तपित्तस्य वक्त्रे विस्रगन्धित्वम् ।** ( अहृनि. ३.५ )
रक्तपित्ताचे एक लक्षण. तोंडाला आमासारखी दुर्गंधि येणे.

**–( गन्धा )**–स्त्री., **वनस्पति० व्रीहिः** ( रा. १६.१०९ )
तांदूळ.

**–गन्धि**–वि., **आमस्यापक्वाऽऽहाररसस्वरूपस्य गन्धोऽस्यास्तीति, विस्रगन्धिः अम्लगन्धिर्वा** ( चचि. १५.५४ )
अपक्वआहाररसस्वरूप; आमासारखी दुर्गंधी ज्याला आहे. वाईट वासाचा. घाण वासाचा, आंबट वासाचा.

**–गन्धिक**–वि., **आमगन्धि, आमगन्धयुक्तः** ( सुउ. ४०.१७५ )
आमाचा वास असलेला.

**–गन्धित्व**–न., **रोगलक्षण० रक्तपित्ते पूर्वरूपविशेषः ।** ( चनि. २.६ )
रक्तपित्ताच्या पूर्वरूपांत हे चिन्ह होते. आमाची घाण तोंडाला येणे.

**–गर्भ**–पु., **षण्मासं यावद्गर्भः** ( सुउ. ४२.१३ )
सहा महिन्याच्या आंतला गर्भ.
**अपक्वो गर्भोऽण्डादिरूपः** ( चशा. ६.१० )
अंडे इत्यादि स्वरूपाचा असतो तो. अपक्व गर्भ.

**–( गर्भा )**–स्त्री., **आमो गर्भो यस्याः सा** ( चशा. ८.३१ )
आम गर्भ असलेली स्त्री.

**–गर्भभ्रंश**–पु., **रोग० आमगर्भस्य भ्रष्टता पतनं वा** ( असंसू. २७.७ )
अपक्व गर्भ स्थानापासून सुटणे; अपक्व गर्भ पडणे.

**–गर्भशेष**–पु., **आमगर्भपतनानन्तरं तस्य अपरादिकः शल्यरूपः शेषः** ( असंशा. ४.१० )
अपक्व गर्भ पडल्यानंतर त्याची गर्भाशयात शिल्लक राहिलेली वार, इत्यादि शेष. हा शेष शल्यरूप असतो.

**–घ्नी**–स्त्री., **वनस्पति० कटुका** ( ध. १.३८ )
कुटकी.

**–ज्वर**–पु., **रोगावस्था० तरुणज्वरः सामज्वरः आमावस्थितो ज्वरः ।** ( अहृसू. १८.७ )
रोगाची एक अवस्था. नवज्वर, अपक्व ज्वर, तरुण-ज्वर. आमदोषांनी उत्पन्न झालेला ज्वर, सामज्वर.

**–तैल**–न., **अपक्वतैलम्, तिलकल्कनिपीडनेन मुष्टितः परिस्रुतं तैलम्** ( सुसू. १६.७ )
कच्चे तेल, तीळ कुटून, मुठीत घट्ट दाबल्यानंतर निघालेले तेल. मुठेल ( तेल ).
**सद्यस्कमनग्निसंबद्धं तैलम्** ( सुचि. ३.३४ )
घाण्याचे नुकतेच काढलेले अग्नीचा संबंध न आलेले तेल.
**तलभङ्गेऽस्थिभङ्गे च परिषेकार्थमुपयुज्यते ।** ( असंउ. ३२ ( पृ. २४१ )
हातापायाचे तळवे फाटले किंवा तळव्यातील हाडे किंवा इतर हाडे तुटल्यावर या तेलाचे सिंचन उपयुक्त आहे.

**–दोष**–पु., **अग्निमान्द्यादपक्वो रसधातुरामाशयस्थो दुष्टश्च आम इत्युच्यते; स एव आमदोषः** ( सुउ. ५०.४ )
मंदाग्नीने अपक्व आणि दूषित रसधातूचे आमाशयातील स्वरूप.

**–पक्वाशय**–पु., **शारीर० आमस्य पक्वस्य चाशयः, कोष्ठः, महास्रोतः शरीरमध्यमित्येतस्य पर्यायाः आभ्यन्तररोगमार्गश्च** ( चसू. ११.४८ )
आमान्नाचा व पक्व अन्नाचा जो आशय तो. याचेच अंतःकोष्ठ, महास्रोतस, शरीराचा मध्य, आंतला रोगमार्ग हे पर्याय शब्द आहेत.

**–पक्वाशयचर**–वि., **कोष्ठचरः** ( सुनि. १.१६ )
आमाशयापासून पक्वाशयापर्यंत संचार करणारा. कोष्ठसंचारी महास्रोतसात संचार करणारा, समान वायु.

**–पक्वाशयान्तर**–न., **आमाशयस्य पक्वाशयस्य च यदन्तरं तद्, आमाशयपक्वाशययोर्मध्यभागः** ( सुशा. ९.७ )
आमाशय व पक्वाशय या दोघांत जे अंतर ते. आमाशय व पक्वाशय यांमधील भाग–पित्ताशय.

**–पक्वैषणीय**–वि., अध्यायसंज्ञाविशेषः, **सुश्रुतसूत्रस्थानगतसप्तदशोऽध्यायः** (सुसू. १७.१ )
अध्यायाचे नांव. यात आम आणि पक्व दोषासंबंधीं वर्णन आहे.

**–पाचन**–वि., **आमस्य पाचनं करोति तत्** ( सुसू. ३८.२३ )
आमाचे पाचन करणारे.

**–पित्त**–न., **आमावरोधवृद्धपित्तम् ।** ( चचि. २३.१५ )
आमाने अवरोध केल्याने वाढलेले पित्त. अपक्व पित्त.

**–प्रजाता**–स्त्री., **या आमगर्भं प्रसूते सा ।** ( चसि. २.१४ )
आमगर्भ पडलेली स्त्री. आमगर्भाला जन्म देणारी स्त्री.

**–प्रदोष**–पु., **रोग०, आमः, अपरिपक्वरस–धातुरूपेणाऽऽमेन जनितो विकारः** ( चवि. २.१० )
आंम. आमदोष. अपरिपक्व रसधातुरूप आमाने झालेला रोग.

**–प्रदोषिकी**–वि., **आमविकारशमनी चिकित्सा** ( चवि. ५.२६ )
आमविकारनाशक चिकित्सा.

**–मत्स्यगन्धिन्**–वि., **आममत्स्यस्येव गन्धो यस्य तत् ( पुरीषम् )** ( चचि. १९.९ )
कच्च्या माशाच्या घाणीसारखी घाण ज्याला आहे तो ( पुरीष–मळ )

**–यव**–पु., **ईषद्भृष्ट–अदलितयवः** ( चचि. २२.२८ )
थोडे भाजलेले न दळलेले जव.

**–लिङ्ग**–वि., **आमलक्षणान्वितम्** ( अहसू. ८.२८ )
आमाची लक्षणे असलेला. आमाचे लक्षण.

**–लोष्ट**–न., **आममृत्पिण्डः** ( सुउ. ४६.२१
न भाजलेले मातीचे ढेकूळ.



**–वात**–पु., **रोग०** ( चचि. २८.१९५ )
एक रोग० संधिवाताचा एक प्रकार.

**सम्प्राप्तिः–मन्दाग्नेर्विरुद्धाहारचेष्टस्य निश्चलस्य स्निग्धान्नं भुक्त्वा व्यायामं कुर्वतो नरस्य वायुप्रेरित आमः श्लेष्मस्थानं गच्छति ततो वातविदग्धः सन् धमनीः प्रतिपद्यते, वातपित्तकफदूषित आमः स्रोतांस्यभिष्यन्दयति, दौर्बल्यं हृदयगौरवं च करोति, स्वरूपम्–युगपत्कुपितावामवातौ अन्तः-कोष्ठे त्रिकसंधिप्रवेशकौ सन्तौ गात्रं स्तब्धं कुरुतः स व्याधिरामवात उच्यते । सामान्यलक्षणम्–अङ्गमर्दस्तृष्णाऽरुचिरालस्यं ज्वरोऽपाको गौरवमङ्गशूनता च ।**

**अतिवृद्धामवातलक्षणम्–हस्तपादशिरोगुल्फत्रिक-जानूरुसंधिषु सरुजशोथं करोति, स देशो वृश्चिकैर्व्याविद्ध इवात्यर्थं रुजते, तत्र दोषलक्षणानि–पवनानुगे आमवाते शूलः, पित्तानुगे दाहरागौ, कफदुष्टे स्तैमित्यं कण्डुर्गुरुता च भवति । उपद्रवाः–अग्निदौर्बल्यं प्रसेकोऽरुचिर्गौरवमुत्साह-हानिर्वैरस्यं दाहो बहुमूत्रता कुक्षिकाठिन्यं शूलं निद्रानाशः तृट्छर्दिर्भ्रमो मूर्च्छा हृद्ग्रहो विड्ग्रहो जाड्यमन्त्रकूजनमानाहश्च । साध्यासाध्यत्वम्–एकदोषानुगः साध्यो द्विदोषजो याप्यः, सांनिपातिकः सर्वदेहचरः कृच्छ्रः ( मा० )**

आमवात; संधिवाताचा एक प्रकार. संप्राप्ति–मंदाग्नि असून विरोधी आहारविहार करणारा, हालचाल न करणारा, स्निग्धान्न खाऊन त्याने व्यायाम न केला तर वायूने नेलेला आम कफस्थानात जातो, नंतर वाताने दुष्ट होऊन धमन्यात येतो, विदग्धतेने पित्त दुष्टि होते, असा वातपित्तकफदूषित आम स्रोतसात आर्द्रता उत्पन्न करतो; दुर्बलता व हृदयात जडपणा करतो. **स्वरूप**–एकदम प्रकुपित आम व वात अंतःकोष्ठात माकडहाडांच्या सांध्यात व इतर सांध्यात प्रवेश करितात व अवयवांची हालचाल बंद करतात. त्या रोगाला आमवात म्हणतात. **सामान्य लक्षणे**–अंग मर्दन केल्याप्रमाणे दुखते, तहान, रुचिनाश, आळस, ताप, अपचन, जडपणा व अंग सुजणे. अतिवाढलेल्या **आमवाताची लक्षणे**–हात-पाय, घोंटा, माकडहाड, गुडघा, मांडी, डोके, यांच्या सांध्यात वेदनायुक्त सूज करतो. तेथे विंचू चावल्या-सारख्या वेदना होतात, **दोषलक्षणे**–वाताचा संबंध

असेल तर शूल, पित्ताचा असेल तर आग व लाली, कफाचा असेल तर ओल्या कपड्याने गुंडाळल्या सारखे वाटणे, खाज, जडपणा ही चिन्हे प्रधान असतात. **उपद्रव**–अग्नि दुर्बल, तोंडाला पाणी सुटणे, अरुचि, जडपणा, उत्साहहानि, तोंड विरस होणे, दाह आणि लघ्वी पुष्कळ, कुशीत कठिणपणा, शूळ, निद्रानाश, तहान, ओकारी, भ्रम, बेशुद्धि, हृदय जखडणे, मळ घट्ट व कडक होणे, जडपणा, आंतड्यात आवाज होणे, पोट फुगणे. **साध्यासाध्यत्व**–एका दोषाचा संबंध असेल तर साध्य, दोन दोषांचा संबंध असेल तर औषधोपचारापुरते बरे वाटते. संनिपाताची व सर्व शरीरव्यापी सूज असेल तर कष्टाने बरे वाटते.

**–विकार**–पु., **अजीर्णान्नजव्याधिः** ( अहृसू. ८.२० ) अन्नाचे अजीर्ण झाल्याने होणारा रोग.

**–विष**–न., **रोग० विषसदृशलिङ्ग आमदुष्टिजन्यः असावाशुकारित्वाद्विरुद्धोपक्रमत्वादसाध्यः** ( चवि. २.१२ )
आमदुष्टीने विषासारखी चिन्हे होतात असा विकार. शीघ्रपरिणामी स्वभावामुळे आणि यावर बहुतेक चिकित्सा कोणत्या ना कोणत्या दोषाच्या विरुद्ध होते म्हणून तो असाध्य असतो. उदाहरणार्थ—
शीतोपचार विषाला योग्य पण आमाच्या विरुद्ध होतात. आणि उष्णोपचार आमाला उपयुक्त पण विषाला विरुद्ध होतात.

**–शकृत्**–न., **अपक्वपुरीषम् ; इदं कुक्षिशूलहेतुः** ( सुउ. ४२.१२४ )
अपक्व मळ. याने पोटात शूळ होतो.

**–शूल**–पु., **रोग० आमाज्जायमानः शूलः** ( र. ३०.३७ )
आमजन्य–आमाने होणारा शूळ.

**शोफ**–पु., **आमावस्थितः शोफः** ( अहृसू. २९.२ ) नवी सूज, कच्ची सूज.

**–सन्न**–वि., **आमेन मन्दीभूतः** ( अहृसू. ८.१८ ) आमाने मंद झालेला ( अग्नि. )

**आमण्ड**–पु., **वनस्पति० एरण्डः** ( ध. १.२९५ ) एरंड.

**आमय**–पु., **रोगः** ( चनि. १.५ )
**प्रायेणामसमुत्थत्वेनामयः ( चक्रः )**
रोग बहुधा आमापासून होतो म्हणून त्याला आमय म्हणतात.
**लिङ्गम्–लिङ्गरूपो व्याधिः** । ( चसू. २९.४ )
चिन्ह, चिन्हरूप व्याधी.

न., **वनस्पति० कुष्ठम्** । ( सुउ. ३९.२५६ ) कोष्ठकोळिंजन

**आमलक**–न., वनस्पति०आवळा.
**तद्गुणाः–अम्लं, तिक्तं, मधुरं, शीतं, लघु, रूक्षं** । ( सुसू. ४४.७०–७१. )
**वृष्यं रसायनं रुच्यं त्रिदोषघ्नं विशेषतः । पित्तघ्नं ज्वरदाहवमनप्रमेहशोफपित्तास्रश्रमविबन्धाध्मान-विष्टम्भघ्नम्** ( ध. १.२१५ )
**इदं वयःस्थापनानां श्रेष्ठम्** ( चसू. २५.४० )
**दाडिमाद्यम्लफलेषु श्रेष्ठम्** ( सुसू. ४६.३३४ )
**कुष्ठघ्नगणोक्तमेकं द्रव्यम्** । ( चसू. ४.११–१३ )
**कासहरगणोक्तमेकं द्रव्यम्** । ( चसू. ४.१६ )
**विरेचनोपगगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१३ )
**तन्मज्जा–अस्थ्यभ्यन्तरं स्निग्धमधुरद्रव्यम्** ;
**तद्गुणाः–मधुरकषायं, पित्तनाशनं, तृष्णाच्छर्दि-निलघ्नं च** ( सुसू. ४६.२०६ )
**च्यवनप्राशाद्यनेकरसायनयोगानामामलकं प्रधानं द्रव्यम्** ( च. चि. १.१ )
**बालमामलकं व्यङ्गेष्वञ्जनार्थमुपयुज्यते** । ( असंउ. ३७ )

N.O.—EUPHOR BIACEAE
ENG.—EMBLICA MYRO BALAN
L.-EMBLICA OFFICINALIS

हिं. — आमला
म. — आवळा
गु. — आवळो
बं. — आम्ला
त. — ( तुप्पो )
फा. — आम्लज्ञम्

**आवळा**–गुण–आंबट, कडु, मधुर, थंड, हलका, रूक्ष, सर्वधातुपोषणक्रम सुधारणारा, शुक्रधातूला हितकर, रुचकर, त्रिदोषनाशक, विशेषतः पित्तनाशक, ज्वर, दाह, वांती, प्रमेह, सूज, रक्तपित्तातील रक्तस्राव, श्रम, अवरोध, व पोटफुगी नाशक. हा तारुण्य कायम ठेवणाऱ्या औषधात श्रेष्ठ. डाळिंब इत्यादि आंबट फळात हा श्रेष्ठ, कुष्ठनाशक, खोकलानाशक व रेचकास उपकारक अशा गणातील एक द्रव्य. आवळ्याच्या आठळीतील गर स्निग्ध, गोड, तुरट, पित्तनाशक, तहान, ओकारी, वातनाशक. च्यवनप्राश इत्यादि योगांत आवळा मुख्य द्रव्य. कोवळा आवळा वांग या रोगात अंजनाकरिता उपयुक्त.

**(आमलकी)**–स्त्री., वनस्पति० आमलकम्। (चक १०८)
तद्बीजं पाण्डुरे असृग्दरे प्रशस्तम्।
( चचि. ३०. ११६–११७ ) आवळा.
ह्याचे बी श्वेत आणि रक्तप्रदररोगात उपयुक्त असते.

**–घृत**–न., सिद्धघृत०
आवळा इ० द्रव्यांनी सिद्धघृत०
**रसायनविध्युपयुक्तं चेद् अजरायुःप्रदं सर्वामय-प्रशमनं च** ( चचि. १ (२) ४–६ )
रसायन विधीने याचा उपयोग केला तर म्हातारपण-रहित आयुष्य प्राप्त होऊन सर्व रोग नष्ट होतात.

**–रसायन**–न., सिद्धयोग० दीर्घायुःप्राप्त्यर्थमुपयुज्यते ( चचि. १ ( १ ) ७५ )
दीर्घायुष्य प्राप्तीसाठी उपयोग होतो.

**आमलकावलेह**–पु., आमलककल्प अजराऽऽयुःप्रदम्
( चचि. १ ( २ ) ७ )
आवळयाचा एक कल्प. म्हातारपणरहित दीर्घायुष्यप्रद.

**आमलकाद्यघृत**–न., सिद्धघृत० पित्तगुल्मशमनमेतत्
( चचि. ५.१२२ )
आवळा इत्यादि द्रव्यांनी सिद्ध तूप.

**( आमलकी ) पत्र**–न., वनस्पति० तालीसकम्
( ध. २.५३ ) तालीसपत्र.

**आमलक्यादिगण**–पु., आमलकीहरीतकीपिप्पल्यश्चित्रकश्चेति गणोऽयं सर्वज्वरापहः कफारोचकनाशनो दीपनश्चक्षुष्यो वृष्यश्च ( सुसू. ३८.६०–६१ )
आंवळा इत्यादि औषधांचा एक गण.
हा गण सर्व ज्वरनाशक, कफ, अरुचिनाशक, अग्नि-दीपक, डोळयांना हितकर आणि पुष्टिकारक.

**आमलसार**–पु., गन्धकभेदः शुकपिच्छाख्यः पीतवर्णः।
( र. ३.१५ )
गंधकाचा एक प्रकार. पिवळा गंधक. शुकपिच्छ हे याचे दुसरे नाव.

**आमाजीर्ण**–न., रोग० अजीर्णभेदः अजीर्णम्
( सुउ. ४०.९५ )
अजीर्ण रोगाचा एक प्रकार.

**आमातिसार**–पु., रोग० आमेनारब्धोऽतिसारः
( अहसू. १९.४ )
**अतिसारस्य आमावस्था** ( चचि. १९.१५ )
आमजन्य अतिसार. अतिसारातील आमावस्था.

**आमानिल**–पु., रोग० आमवातः ( र. २१.५० )
एक रोग. आमवात. संधिवाताचा एक प्रकार.

**आमान्वय**–पु., आमसंबन्धः ( चशा. ८.२५ )
आमाचा संबंध.

**आमाशय**–पु., शारीर० आशयविशेषः, जन्तोर्नाभिस्तनान्तरमामाशय इत्युच्यते, अन्नाशितं खादितं पीतं लीढं च विपच्यते। ( चवि. २.१७ )
**अन्नवहानां स्रोतसां मूलम्।** ( चवि. ५.८ )
**पञ्चदशकोष्ठाङ्गेष्वेकः।** ( चशा. ७.१० )
ज्यात चारही प्रकारचे अन्न पचते असा छातीपासून नाभीपर्यंत पसरलेला अवयव. पंधरा कोष्ठांगांपैकी एक. कफ व पित्तस्थान. अन्नवह स्रोतसांचे मूळ.
**अयं पित्ताशयस्योपरिष्टात्तत्प्रत्यनीकत्वादूर्ध्वगतित्वात्तेजसश्चंद्र इव आदित्यस्य स चतुर्विधस्याऽऽहारस्याऽऽधारः स च तत्रौदकगुणैराहारः प्रक्लिन्नो भिन्नसंघातः सुखजरश्च भवति, अयम् आमाशयः श्लेष्मस्थानम्** ( सुसू. २१.१२. )
पित्ताशयाच्या वर असलेला अवयव हा फक्त चारही प्रकारच्या आहाराचा आधार. तेथे जलीय गुणांनी युक्त आर्द्रस्वरूप आहार खूप ओला, विरळ व सुखाने जिरण्यासारखा होतो. अन्न पचन याच्या खाली होते. हा आमाशय कफस्थान. चरक ज्याला आमाशय म्हणतात त्याचे सुश्रुत आमाशय व पित्ताशय असे दोन विभाग कल्पितात.
**स्पष्टीकरण**—जलीय गुणयुक्त आहार ज्यात आहे असा शीतगुणी चंद्रासारखा आमाशय हा त्याच्या विरुद्ध तैजसगुणी पित्ताशयरूपी सूर्याच्या वर असतो.
**असौ विशेषेण पित्तस्य स्थानम् 'आमपक्वाशयौ स्थानं विशेषात्पित्तवातयोः'** ( कासू. २७.१२ )
आमाशय विशेषतः पित्ताचे स्थान होय. चरकमताचा हा आमाशय होय. आमाशय व पक्वाशय ही स्थाने विशेषतः क्रमाने पित्त व वाताची स्थाने होत.

**आमाशयद्वार**–न., शारीर० आमाशयद्वारसमीपे वर्तमानम् ( हृदयाख्यं मर्म ) ( सुशा. ६.२५ )
आमाशयाच्या तोंडाशी असणारा अवयव. ( हृदय )

**आमाशयसमुत्थ**–वि., आमाशयाश्रयम् कफपित्तजं सर्वमेव रोगानीकम्। ( चवि. ६.३ )
आमाशयात उत्पन्न होणारा, आमाशयात आश्रय करणारा, आमाशयात होणारा, सर्व कफपित्तात्मक रोगसमुदाय.

**आमाशयोत्क्लेश**–पु., आमाशये दोषाणामुत्क्लेशनम्
( चचि. २०.८. )
आमाशयाचा उत्क्लेश. आमाशयातील दोष उचंबळणे; दोष घशापर्यंत गरळ रुपाने येणे. घशाशी येणे.

**आमाशयोष्मन्**–पु., जाठराग्निः । ( चचि. ३.२७३ )
जठराग्नि. आमाशयातील अग्नि.

**आमिष**–न., जङ्गमद्रव्यम् मांसम् ( चसू. १.६८ )
मांस.
**निर्यास॰** गुग्गुल ( सुचि. ३७.१५ )
गोंद, गुग्गुल.

**आमुष्मिक**–वि., परलोकभवम् । ( सुसू. १.४ )
परलोकात होणारा.

**आमोद**–पु., वनस्पति॰ शतावरी ( र. २१.१३९ )
शतावरी नामक वनस्पति.

**–जननी**–स्त्री., वनस्पति॰ ताम्बूलं ( ली )
( ध. ३.२ ) विड्याचे पान, ताम्बूल.

**आम्नाय**–पु., आगमः ( चशा. ८.४६ ) वेदः । वेदशास्त्र.

**आम्भस्**–वि., आप्यम् । ( असंशा. ५.१२ ) जलीय द्रव्य.

**( आम्भसी )**–वि., छायाविशेषः शुद्धवैडूर्यविमला सुस्निग्धा छाया ( चइं. ७.१२ )
एक प्रकारची छाया, शुद्धवैडूर्य मण्यासारखी विमल व सुस्निग्ध छाया.

**आम्र**–पु., न., वनस्पति॰ आंबा.
वृक्षविशेषः अस्य फलं भक्षणार्थं तथा पुष्पपल्लवबीजादीनि च भैषज्यार्थमुपयुज्यन्ते,संपक्वाम्रफलगुणाः– मधुरं कषायानुरसं गुरु स्वादुपाकं हृद्यं वर्णकरं रुच्यं रक्तमांसबलप्रदं बृंहणं शुक्रवर्धनं वातघ्नं पित्ताविरोधि च । ( ध. ५.१ )
अस्य पुष्पं दृष्टिरोगेष्वञ्जनार्थमुपयुज्यते ।
( सुउ. १७.८–१० )
अस्य पल्लवाश्छर्दिनिग्रहणम् ( चसू. ४.१४ ( २८ )
अस्यास्थि पुरीषसंग्रहणीयम् ( चसू. ४.१५ ( ३१ )
अस्य फलं मूत्रसंग्रहणीयम् ( चसू. ४.१५ ( ३३ )
तथा रक्तपित्तशमनम् । ( सुउ. ४५.२३ )
बालामं कषायकट्वम्लं रूक्षं वातास्रपित्तकृच्च ।
( असंसू. ७.१८८ )
पर्यागताम्रं साम्लं स्वादु स्निग्धं गुरुमारुतघ्नमपित्तलं हृद्यं श्लेष्ममांसशुक्रबलप्रदं च ।
( असंसू. ७.१८९–९० )
राजाम्रं ( आम्रभेदः ) तुवरं स्वादु विशदं शीतलं गुरु ग्राहि रूक्षं विबन्धाध्मानवातकृत् कफपित्तनुच्च
( भाप्र. )
( आम्रभेदः ) बालं कोशाम्रं ग्राहि ोष्णं गुरु पित्तलं च ( भाप्र. )

N.O.—ANACARDIACEAE
L.—MANGIFEKA INDICA
ENG.—MANGO
हिं.—आम
म.—आंबा
गु.—आंबो
बं.—आम
त.—मामरं, तितळें, मांति

आंबा. याचे फळ खाण्याकरिता उपयुक्त. फुले, पाने, कोय इत्यादि औषधाकरितां उपयुक्त. चांगला पिकलेला आंबा–गुण–गोड, मागाहून तुरट, जड, रुचकर, पचनानंतर गोड, हृदयाला हितकर, वर्ण सुधारणारा, पौष्टिक, रक्तमांस यांना बलप्रद, शुक्रवर्धक, वातनाशक, पित्ताला अविरोधी आहे. याचे फूल दृष्टिरोगात अंजनाकरिता उपयुक्त; याच्या पानाने ओकारी नाहीशी होते, कोय मळ घट्ट करते, फळ लघ्वीला कमी करते, रक्तपित्तशामक आहे. **बाळ आंबा** तुरट, तिखट, आंबट, रूक्ष, वातरक्त व पित्तकर आहे. **पाडाला आलेला आंबा** आंबट रस, गोड, स्निग्ध, जड, वातघ्न, थोडा पित्तकर, हृदयाला हितकर, विशद म्हणजे आर्द्रताशोषक व रोपणकार्यकर, कफ, मांस, शुक्र व बळ देणारा **रायवळ आंबा**– तुरट, गोड, थंड, जड, मळ घट्ट करणारा, रूक्ष, कफपित्तहर, अवरोध, पोटफुगी व वात करतो. **कोवळा रानआंबा** आंबट, मळ बांधणारा, उष्ण, जड, वातघ्न, पित्तकर.

न., **मान॰ पलम्, द्वे पलार्धे आम्रम्**
( चक. १२.९२ )
एक वजन. पलनामक एक मान ( वजन )

**–गन्धकृत्**–पु., वनस्पति॰ समाष्ठीलः
( रापरि. ४.१ )
नवाम्र वा काकाम्र नामक वनस्पति.

**–पल्लव**–पु. कोमलमाम्रपर्णम्, छर्दिनिग्रहणगणोक्तं द्रव्यम् । ( चसू. ४.१४–२८ )
आंब्याची कोंवळी पाने. वांती बंद करणाऱ्या औषधिगणातील एक द्रव्य.

**–पेशी**–स्त्री., शुष्कः आम्रसारभागः
( र. १६.१७–२४ )
कच्चेपणी सुकवलेल्या आंब्याच्या गराच्या फोडी.

**–शालि**–पु., शालि॰ रक्तशालिः ( रा. ६.८७ )
लाल साळ, लाल तांदूळ,

**आम्रातक**–पु., न., वनस्पति० आम्रसदृशफलवृक्षः "आम्राटकः", "वनाम्रः", "आम्राडकः" (चक्र) इत्यपि नामानि

**तत्फलगुणाः—कषायं मधुरमम्लं शीतं गुरु वृष्यं रक्तपित्तकरं कफकरं किञ्चिद्वातकृद् दीपनं च.** ( ध. ५.१२ )

**तथा बृंहणं तर्पणं बल्यं च, इदं विष्टभ्य जीर्यति** ( सुसू. ४६.१५५ )

**हृद्यगणोक्तमेकं द्रव्यम् ।** ( चसू. ४.१० )

N.O.—ANACARDIACEAE
L.-SPONDIASMANGIFERA

हिं.—अंवाडा
म.—आंबाडा
गु.—जंगली आंबो, अंमेडा
बं—आमडा

**आंबाडा**–आंब्यासारखे फळ असणारा वृक्ष. दुसरी तीन नावे वर दिली आहेत. **फळाचे गुण**–तुरट, गोड, आंबट, थंड, जड, शुक्राला हितकर, रक्तस्राव करणारा, कफ व किंचित वातकर, अग्निदीपक, तृप्ति व पुष्टि करणारा, बलवर्धक. हा पोटात वात धरून पचतो. हृदयास हितकर गणातील एक द्रव्य.

**आम्रान्त**–पु., **वनस्पति० राजाम्रः** ( ध. ५.११ )
कलमी आंब्याचे फळ. हापूस, लंगडा, इत्यादी.

**आम्रास्थि**–न., **आम्रफलान्तर्गतं कठिनं बीजम्, बीजान्तर्गतमज्जा, पुरीषसंग्रहणीयगणोक्तं द्रव्यम् ।** ( चसू. ४.१५–३१ )
आंब्याची कोय. कोयीचे कठिण कवच. कोयीचा गर.

**आम्रास्थिमध्य**–न., **आम्रफलमज्जा, पक्वातिसारजित्** ( सुउ. ४०.७० )
आंब्याच्या कोयीचा गर पक्व अतिसारनाशक.

**आयत**–वि., **दीर्घम्** ( सुचि. २४.४ ) दीर्घ. लांब.
**–यामा**–वि., **दीर्घप्रहरा निशा ।** ( सुसू. ४६.४६८ )
मोठी रात्र ( हिवाळी रात्र )

**आयतन**– न., **स्थानम् ।** (चसू. २९.३ )
स्थान, वसतिस्थान, ठिकाण.
**स्थान अधिष्ठानहेतुः निदानम् ।** ( चनि. १.३ )
जागा, आसन, आधार हेतु, निदान, कारण.

**आयताक्ष**–वि., **रिष्टलक्षण० आयतेऽक्षिणी यस्य सः, विस्फारितनेत्रः ।** ( चइं. १०.९ )
मरणदर्शक चिन्ह. विस्तारलेले डोळे. वटारल्या सारखे डोळे.

**आयत्त**–वि., **आधीनम् ।** ( अहृसू. ७.५३ )
वश, अधिकारातला, स्वाधीन.

**आयम**–न., **आकर्षणम् ।** ( चचि. २८.४४ ) **द्विधाभवनम् ।** ( सुउ. ५१.१२ )
आकर्षण, ओढणे, ओढ, खेचणे, खेंच.

**आयम्यमान**–वि., **आकृष्यमाणम् ।** ( सुउ. ५१.१३ )
आकर्षित होणारा. ओढलेला, ओढला जाणारा, ताणला जाणारा.

**आयस्**–न., **खनिज० तीक्ष्णलोहम् द्र० ' लोह. '** ( रा. १३.३० ) लोखंड, पोलाद. पहा ' लोह '
वि., **लोहनिर्मितम् ।** ( र. ३.१७३ )
लोखंडापासून–पोलादापासून बनविलेले.

**–चूर्ण**–न., **लोहचूर्णम्, गोमूत्रयुक्तत्रिफलासहितं पाण्डुरोगशमनम् ।** ( सुउ. ४४.२१ )
लोहाचे चूर्ण, पोलादाचे चूर्ण.पांडुरोगनाशक.

**–पात्र**–न., **लोहपात्रम्, घृतमायसे पात्रे निदध्यात् ।** ( असंसू. १०.३६ )
लोखंडाचे भांडे, पोलादाचे भांडे, तूप लोहपात्रांत ठेवावे.

**–पिण्डक**–पु., **लोहपिण्डः ।** ( असंसू. ६.२६ )
लोखंडाचा गोळा.

**–पूटक**–न., **लोहभवं पूटकम् ।** चसू. १४.२६ )
लोखंडाचे एकावर एक झाकून बसतील असे लोखंडी २ परळ किंवा करंड.

**–भाजन**–न., **लोहपात्रम् । तत्र कषायरसप्रधानमञ्जनं स्थापयेत् ।** ( अहृसू. ३०.१६; सुउ. ४४.३२–३३ )
लोखंडाचे भांडे यात कषायरस प्रधान अंजन ठेवावे.

**=मल**–न., **लोहकिट्टम्, इदं कुम्भाह्वयं पाण्डुरोगं हन्ति ।** ( सुउ. ४४.३२-३३ ) मंडूर. लोखंडाचे किट्ट. कुंभकामला ( पांडुरोग प्रकार ) नाशक.

**आयाम**–पु., **रोगलक्षणम्, अवयवानामनैच्छिक आतानः ।** ( चसू. १४.२४ )
रोगामुळे–दुष्टवाताने अवयवांना इच्छेविरुद्ध ताण. तणावा–ताणणे. धनुर्वात.
**वातरोग० स द्विविधः अन्तरायामो बाह्यायामश्च ।** ( चचि. २८.३५ )
हा वात रोग दोन प्रकारचा. एक आंतला धनुर्वात, दुसरा बाहेरचा धनुर्वात.
**दैर्घ्यम् ।** ( चवि. ८.११७ ) दीर्घता. लांबी.

**–विस्तारसम**–वि., **इष्टशरीरलक्षणम्. आयामो दैर्घ्यं**

**विस्तारस्तिर्यक्परिमाणं समं यस्य तत् शरीरम्.**
( चवि. ८.११७ )
आरोग्ययुक्त शरिराचे नैसर्गिक लक्षण. उंची व रुंदी समान असणे.

**–व्यायामोत्तुण्डिता**–स्त्री., **बालनाभिरोग० नाड्या असम्यक्कल्पनोत्पन्ननाभिपाकजनितो दोषः, आयाम-व्यायामाभ्यां दीर्घपीनत्वयुता** ( चशा. ८.४५ )
**सुश्रुते 'तुण्डि' इति संज्ञितो रोगः ।**
( सुशा. १०.४३ )
बालकाच्या बेंबीचा रोग. नाळ नीट न कापल्यामुळे बेंबी पिकते व त्यामुळे हा रोग होतो. ती नाळ वेडीवांकडी ओढल्यामुळे, ताणल्यामुळे, अधिक घेराची, उंच फुगलेली अशी होते. सुश्रुत ग्रंथात याला तुंडी म्हणतात.

**आयास**–पु., **अल्पक्रियया श्रमः** । ( चसू. १७.६६ )
**श्रमाधिक्यम्, असौ सर्वापथ्यानां श्रेष्ठः ।**
( चसू. २५.४० ) **दुःखम् ।** ( चनि. ७.४ )
थोड्या हालचालीने श्रम होणे, थकवा वाटणे, श्रमाधिक्य हे सर्व अपथ्यातले मोठे अपथ्य. दुःख.

**आयुध**–न,, **शस्त्रम्** ( असंसू. ४०.१५ )
हत्यार, शस्त्र, औजार.

**आयुष्य**–वि., **आयुषे हितम्, आयुर्वर्धनम्**
( अहृसू. २.१६ )
आयुष्याला हितकर. आयुष्य वाढविणारे.

**आयुस्**–न.. **शरीरेन्द्रियसत्वात्मसंयोगः, जीवितम् पर्यायाः–धारि, अनुबन्धः, नित्यगः**
( चसू. १.४२ )
शरीर, इन्द्रिय, मन व आत्मा यांचा संयोग. धारि, अनुबंध, नित्यग हे याचे पर्याय शब्द.

**आयुष्यम्**–**प्राणलक्षणवायुना योगः** । ( चवि. ८.९१ )
( ३.३४ )
आयुष्य. प्राणवायूचा शरिराशी संयोग. जीविताचा अवधि–काळ. आयुष्याचे मान–मर्यादा.
**दीर्घायुः दीर्घजीवितम्** । ( चइं. १२.८८)
दीर्घायुष्य, दीर्घ जीवित.
न., **घृतम्** ( रा. १५.२०२ ) तूप.

**( आयुः ) क्षपण**–न., **आयुर्विनाशः** ( सुचि. २९.१५ )
आयुष्याचा नाश. मरण.

**( आयुर् ) ज्ञ**–पु., **आयुर्वेदज्ञः, आयुर्ज्ञानवान् वैद्यः**
( असंशा. १०.३५ )
आयुष्याचे ज्ञान असणारा; आयुर्वेदज्ञ. वैद्य.

**–र्ज्ञानफल**–न., **आयुर्मानज्ञानस्य फलम्, आयुर्ज्ञानफलं तु विद्यादनायुषि भेषजदानम्** ( चइं.११.२८ )
आयुष्याच्या ज्ञानाचे फळ. अल्पायुषी आहेसे कळल्यास औषध देता येते.

**–प्रकर्ष**–पु., **परमदीर्घायुष्ट्वम्** । ( चचि. १ ( १.७३ )
आयुष्याची परमावधि. खूप दीर्घायुष्य.

**–प्रकर्षकृत्**–वि., **परमदीर्घजीवितकरः**
( चचि. १ ( ३ ) २३ ) दीर्घायुष्य वाढविणारे

**–प्रकर्षार्थ**–वि., **आयुःप्रकर्षः प्रयोजनं यस्य**
( चचि. १ ( ४ ) ३७ )
आयुष्याची खूप वाढ होणे हेच ध्येय असलेले.

**–प्रद**–वि.,**दीर्घायुःप्रदः** । ( चचि. १ ( ३.४७ )
दीर्घायुष्य देणारा.

**–वृद्धिकृद्गण**–पु., **दानं, दया, शीलं, सत्यं, कृतज्ञता, ब्रह्मचर्यं, मैत्री रसायनानीति पुण्यायुर्वृद्धिकराण्येतानि** ( र. ३०.११३ )
पुण्य व आयुष्याची वृद्धि करणारा गण.
दान, दया, शील, सत्य, उपकार जाणणे, ब्रह्मचर्य मैत्री व रसायन हा तो गण.

**–वेद**–पु., **आयुषो वेदः भिषजां शास्त्रम् आयुर्वेदयतीत्यायुर्वेदः** ( चसू. ३०.२३ )
आयुष्याचा वेद. वैद्यांचे शास्त्र. आयुष्य जाणणारा आयुर्वेद.
**आयुरस्मिन्विद्यत इति** ज्यात आयुष्यज्ञान असते.
**आयुर्ज्ञायतेऽनेनेति** आयुष्य ज्याच्याने समजते.
**आयुरनेन प्राप्नोतीति** ( सुसू. १.१५ )
ज्याच्याने आयुष्य मिळते.
**हिताहितसुखदुःखादिभेदाच्चतुर्विधमायुः एतस्य चतुर्विधस्यायुषो हिताहितं मानमित्येतदस्मिन् व्याख्यातम्** ( अहृसू. १.२ )
**अयं वातपित्तकफाश्रयः,** ( कवि. १ ) **आयुर्वेदो नामोपाङ्गमथर्ववेदस्यानुत्पाद्यैव प्रजाः श्लोकशतसहस्रमध्यायसहस्रं च कृतवान् स्वयम्भूस्तस्य पुनरष्टधा विभजनं तेनैव कृतम्** । ( सुसू. १.६ )
**तस्याष्टावङ्गानि–कायचिकित्सा, शालाक्यं, शल्यापहर्तृकं, विषगरवैरोधिकप्रशमनं, भूतविद्या, कौमारभृत्यकं, रसायनं, वाजीकरणमिति ।**
( चसू. ३०.२८ )
**अयं चरक–सुश्रुत–काश्यपवाग्भटादिमहर्षिभिः संहितारूपेण परिष्कृतः, अस्य प्रयोजनम् व्याध्युपसृष्टानां व्याधिपरिमोक्षः स्वस्थानां स्वास्थ्यरक्षणं चेति** ) ( सुसू. १.१४ )

आयुर्वेदोऽमृतानां जीवितप्रदानहेतूनां श्रेष्ठः । ( चक्र. चसू. २५.४० )

**आयुर्वेद** :–आयुष्याचा वेद, ज्यात हितकर, अहितकर, सुखकर, दुःखकर असे चार प्रकारचे आयुष्य व त्याला हितकर व अहितकर, त्याचे प्रमाण इत्यादि सांगितले आहे ते शास्त्र. हे वातपित्त व कफ यांचे वर आधारले आहे. आयुर्वेद हा अथर्ववेदाचे उपांग आहे, प्रजा निर्माण करण्यापूर्वीच एक लक्ष श्लोकांचा हजार अध्यायांचा आयुर्वेद स्वयंभू भगवानाने केला; त्यानेच आठ विभागात विभागून तो केला. **आठ वर्ग**–कायचिकित्सा, सळईच्या उपयोगाचे रोग, शल्यात्मक रोग, विष, गर, विरोधि द्रव्यांचे शामक, भूतविद्या, बालचिकित्सा, सर्वधातुपरिपोषण, शुक्रधातुपरिपोषण अशी आठ अंगे. हा चरक, सुश्रुत, काश्यप, वाग्भटादि मोठ्या ऋषींनी संहिता रूपाने ग्रथित केला. याचे प्रयोजन व्याधिग्रस्तांची व्याधिमुक्ति व स्वस्थांचे स्वास्थ्यरक्षण हे आहे. आयुर्वेद अमृतांमध्ये व जीवित दान करणाऱ्या कारणात (शास्त्र) श्रेष्ठ आहे.

**–वेदरसायन**–न., **टीका, संज्ञाविशेषः, हेमाद्रिणा कृता अष्टाङ्गहृदयस्य टीका ।**

अष्टांगहृदयावरची टीका. हेमाद्रीची टीका.

**–वैदिकसमय**–पु., **संकेतविशेषः, आयुर्वेद अस्य शब्दस्य अयमर्थो भवतीति** ( चवि. ८.५४ )

एक संकेत. आयुर्वेदात या शब्दाचा हा अर्थ होतो असा संकेत.

**( आयुष् ) काम**–वि., **दीर्घायुष्कामः** ( चचि. २[४]४० ) ( चचि. १ [१] ५७ ) दीर्घआयुष्याची इच्छा.

**( आयुष् ) कामरसायन**–न., **रसायनविशेषः युक्तरथादि** ( सुचि. २८.९.२४ )

दीर्घायुष्य वाढविणारे रसायन.

**–कामीय**–वि., **अध्यायसंज्ञा०** ( अहसू. १.१ )

अध्यायाचे नांव. यात दीर्घायुष्याचा विचार केला आहे

**–मत्**–वि., **दीर्घायुः** ( सुसू. ३४.२१ )

आयुष्यमान्. दीर्घायुषी.

पु., **वनस्पति० जीवकः** ( ध. ५.१५५ )

अष्टवर्गापैकी एक वनस्पति. जीवक.

**आर**–न., **खनिज० पित्तलम्** ( १.१२.२१ ) पितळ.

**रौप्यम्** ( र. ५.२१९ ) रुपे; चांदी.

**मुण्डलोहम्** ( रा. १३.२९ ) मुंडलोह.

**वृश्चिकपुच्छकण्टकः** ( सुक. ३.५ )

विंचवाच्या शेपटीचा काटा, नांगीचा काटा.

**–कूट**–पु., न., **पित्तलम्** ( र. ५.२१९ ) पितळ.

**आरग्वध**–पु., **वनस्पति० तद्गुणाः तिक्तोऽतिमधुरः** (रा) **उष्णः, शीतः** ( रा ) **गुरुः त्रिदोषघ्नो, विशेषतः कफघ्नः कृमिशूलोदरप्रमेहमूत्रकृच्छ्रगुल्मज्वरकण्डूकुष्ठविष्टम्भघ्नश्च ।** ( ध. १.२१९ )

**अयं मृदुर्मधुरशीतलश्च, हृद्रोगवातासृगुदावर्तादिरोगेषु बाले वृद्धे क्षीणे क्षते सुकुमारे मानवे चाधिकं पथ्यः ।** ( चक्र. ८.४–५ ) **कुष्ठघ्नगणोक्तमेकं द्रव्यम् ।** ( चसू. ४.११.१३ ) **फलमस्य विरेचनार्थं प्रयुज्यते ।** ( चसू. २.१० ) **कषायोऽस्य विद्रध्यादिधावनार्थमुपयुज्यते** ( सुचि. १६.२४ ) **मूलं वल्मीकलेपनार्थम् ।** ( सुचि. २०.५० )

N. O.—LEGUMINOSAE, CACSALPINIACEAE

L.—CASSIA FISTULA

ENG.—PURGING CASSIA

हिं.—अमलतास

म.—बाहवा

गु.—गरमालो

बं —सोन्दाल

त.—कोन्नै

फा.—खियारे चंबर

बहावा. गुण–कडु, अतिगोड, उष्ण, जड, मृदु, त्रिदोषनाशक पण विशेषतः कफनाशक, कृमिशूल, उदर, प्रमेह, कष्टाने लघ्वी होणे, गुल्म, ज्वर, खाज, कुष्ठ, अवष्टंभनाशक, हृद्रोग, वातरक्त, वात वर चढणे इत्यादि रोगनाशक, बालक, वृद्ध, क्षीण, उरःक्षती, सुकुमार मनुष्य, यांना अधिक पथ्यकर याचे **फळ** रेचक. कुष्ठघ्न गणातील एक द्रव्य. विद्रधि इत्यादिकांचे व्रण धुण्याकरिता याचा काढा व वारुळरोगावर लेपाकरिता मूळ उपयुक्त.

**आरग्वधादिगण**–पु., **आरग्वधमदनगोपघोण्टाकण्टकीकुटजपाठापाटलामूर्वेन्द्रयवसप्तपर्णनिम्बकुरुण्टकदासीकुरुण्टकगुडूचीचित्रकशार्ङ्ग (ङ्गे) ष्टाकरञ्जद्वयपटोलकिराततिक्तकानि सुषवी चेति, अयं श्लेष्मविषापहः मेहकुष्ठज्वरवमीकण्डूघ्नो व्रणशोधनश्च ।** ( सुसू. ३८.६–७ ) ( अहसू. १५,१८ )

बहावा इत्यादींचा गण–बहावा, गेळफळ, एक जातीची सुपारी, वेहेकळ, कुडा, पहाडमूळ, पाडळ, मोरवेल, इंद्रजव, सप्तपर्णी, निंब, कोऱ्हांटी, निळी कोऱ्हांटी, गुळवेल, चित्रक, कावळी, दोम्ही करंज,

पडवळ, काडेचिराईत, कारले हा गण कफ, विष, प्रमेह, कुष्ठ, ज्वर, वांती, कंडूनाशक, व्रणशुद्धिकर.

**आरग्वधादिघृत**–न., सिद्धघृत० **कफगुल्मापहमिदम्** ( सुउ. ४२.३७ )
बहावा इत्यादि द्रव्यांनी सिद्ध तूप. कफगुल्मनाशक.

**आरग्वधीय**–वि., अध्यायसंज्ञा० ( चसू. ३.१० )
अध्यायाचे नांव.

**आरणिक**–पु., वनस्पति० **अग्निमन्थः** ( ध. १.१११ )
अरणी नामक वनस्पति, टहाकळ.

**आरण्यमाष**–पु., माष० **तद्गुणाः—स्वजात्यपेक्षया रूक्षः कषायोऽविदाही च** ( सुसू. ४६.३६ )
जंगली उडीद. रान उडीद. खऱ्या उडदापेक्षा रूक्ष व तुरट असून विदाह न करणारा.

**आरतकम्पन**–न., रोगलक्षण० **अविश्रान्तकम्पनम्** ( चइं. ७.२७ )
अखंड कंपन; सारखा कंप, सतत कंप, कांपरे.

**आरनाल**–न., पु., आसुत० **काञ्जिकम्** ( चचि. २७.४६ )
**निस्तुषीकृतैरामैः पक्वैर्वा संधितैर्गोधूमैरारनालं भवति,** ( भाप्र. )
गव्हाची तुसे काढून टाकून ते कच्चे किंवा पक्के आंबवून केलेले आंबट द्रवद्रव्य; गव्हाची कांजी ( आंबट )

**आरम्भ**–पु., प्रयत्नः कृतिः ( चवि. ८.६७ )
प्रयत्न, कार्य. कार्याची सुरवात करणे–कृति.
**चिकित्सा** (चनि. ३.१६) रोगोपचार, औषधोपचार

**–फल**–न., **कर्मफलं कर्मपरिणामो वा** ( चवि. ८.३८ )
कर्माचे फळ–कर्माचा परिणाम.

**–सामर्थ्य**–न., **उपक्रमसामर्थ्यम्** । ( सुसू. ४०.३ )
सुरू केलेल्या उपक्रमाचे सामर्थ्य.

**आरा**–स्त्री., **व्यधनोपयोगि शस्त्रम् । अष्टाङ्गुलायामं वा, अर्धाङ्गुलवृत्तास्यं तिलप्रमाणफलं दूर्वाङ्कुरपरीणाहं, गोपुच्छसन्निभवृन्तं शस्त्रं चर्मकाराणामारेव** ( सुसू. ८.४ (ड) अहसू. २६.२५ )
आरी ( चांभाराची ) सारखे शस्त्र.
**उपयोगः—कर्णपालीव्यधने** ( सुसू.१६.२ )
**पक्वामसंशये शोफव्यधने** ( अहसू. २६.२५ )
**अस्थनि वायौ निरुद्धे सति अस्थिवेधनार्थम्** ( सुचि. ४.९० ) **उन्मादे मदविनाशार्थं व्यथादाने प्रयुक्तमेतत्** ( सुउ. ६२.१९ )
आरी; विंधण्याचे शस्त्र; आठ अंगुळे लांब, त्याचे तोंड अर्धा अंगुळ वाटोळे, फाळाचा तिळा एवढा घेर, दूर्वांकुरा एवढी गाईच्या शेपटासारखी मूठ असलेले शस्त्र. सूज कच्ची की पिकलेली हे पहाण्याचे वेळी भोक पाडण्याला तसेच उन्मादात रोग्याला टोचून त्रास देण्याकरिता उपयोग करतात.
**वारिचरवर्गीयः पक्षी** ( चसू. २७.४३ )
पाण्यात राहाणारा पक्षी.

**–कुट्ट**–न., **खनिज० पित्तलम्** । ( रा. १३.१७ )
पितळ.

**आराम**–पु., **उपवनं, उद्यानम्** ( सुशा. ७.३ )
बाग, बगीचा–उद्यान.

**–शीतला**–स्त्री., वनस्पति० **नन्दा, महानन्दा वा, तद्गुणाः—तिक्ता शीतला पित्तहारिणी दाहशोषशमनी विस्फोटव्रणरोपणी च ।** ( रापरि. १०.५२ )
एक वनस्पति, नंदा, महानंदा ही दुसरी नावे. **गुण**–कडु, थंड, पित्तहारक, दाह, शोषशामक फोडांचे व्रणरोपक.

**आराव**–पु.,शब्दः ध्वनिः ( चवि. ३.७. (३)
आवाज, शब्द, ध्वनि.

**आरुक**–न., वनस्पति० **फलविशेषः तद्गुणाः—मधुरं शीतं हृद्यमर्शःप्रमेहगुल्मरक्तदोषघ्नम् ।** ( ध. ५.३८ ) **कार्तिकेयपुरे प्रसिद्धमिदम्, संपक्वफलं नात्युष्णं गुरु स्वादुप्रायं मुखप्रियं बृंहणं क्षिप्रं जरणशीलं नातिदोषलं च.** ( चसू. २७.१३२ ); **अनेनैव नाम्ना प्रसिद्धम् ।** ( सुसू. २२.८ ड )
**इदं हिमालयदेशे काबूलदेशे चोपलभ्यते**
अलबुखार **गुण**–गोड, थंड, हृदयास हितकर, मूळव्याध, प्रमेह, गुल्म, रक्तदोष नाशक, याचे पिकलेले फळ थोडे उष्ण, जड, गोड, आवडणारे, पौष्टिक, लवकर जिरणारे, थोडे दोष करणारे. हिमालयांत व काबूल देशात उपलब्ध.
N. O.—ROSACEAE
L.—PRUNUS COMMUNIS
हिं.—आलुबुखारा
म.—अलबुखार, अरुक
गु.—आलु
बं.—आलुबखेरा

**आरुष्कर**–न., पु., **वनस्पति० भल्लातकः ।** ( सुसू. ४६.१९६ )
भिलावा, बिब्बा.

**—तैल**—न., **भल्लातकस्नेहः** । ( असंसू. ६.१०६ )
भिलाव्याचे तेल.

**आरुष्करोत्थतैल**—न., **भल्लातकस्नेहः** ( ध. ६.१३८ )
भिलाव्याचे तेल.

**आरेवत**—पु., **वनस्पति० आरग्वधः** । ( ध., १.२१९ )
बाहवा.
न., **वनस्पति० पारेवतम्** । ( ध.५.६६ )
पारेवत नांवाची वनस्पति.

**आरोग्य**—न., **धातुसाम्यम्, प्रकृतिः सुखम्** ( चसू. ९.४ )
आरोग्य. प्रकृति, सुख, निरोगीपणा. धातुसाम्य.
**तल्लक्षणम्—सत्वलक्षणसंयोगः, वैद्यद्विजातिषु भक्तिः, साध्यत्वं, निर्वेदाभावः** ( आत्मन्यवज्ञा ) **च,** ( चइ. १२.८७ ) **आरोग्यलक्षणानि—अन्नाभिलाषो, भुक्तस्य सुखेन परिपाकः सृष्टविण्मूत्रवातत्वं, शरीरस्य लाघवं, सुप्रसन्नेन्द्रियत्वं, सुखस्वप्न—प्रबोधनं बलवर्णायुषां लाभः, सौमनस्यं, समाग्निता चेति** ( काखि. ५.६—८ )
**आरोग्यं धर्मार्थकाममोक्षाणां मूलम्** । ( चसू. १.१५ )
आरोग्याचे लक्षण—सत्वाचे गुण अंगी येणे, वैद्य व ब्राह्मणांवर भक्ति, कोणताही रोग सहज साध्य होणे, दुःख, खेद यांचा अभाव, अन्नाची इच्छा, खाल्लेले सुखाने पचणे, अग्नि सम असणे, मळमूत्र, वात वेळेवर व्यवस्थित बाहेर पडणे, शरीर हलके वाटणे, बल, वर्ण व आयुष्य चांगले असणे, सुखाने झोप येणे, व जागे झाल्यावर हुषारी वाटणे, इंद्रिये सुप्रसन्न असणे व मन आनंदी असणे. आरोग्य हे धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांचे मूळ होय. आरोग्यामुळे बल, आयुष्य, सुख तसेच इतर इच्छित गोष्टींचा लाभ होतो.

**—वर्धनी**—स्त्री., **सिद्धयोग० इयं नागार्जुनप्रणीता गुटी एषा पाचनी, दीपनी, हृद्या, मेदोविनाशिनी मलशुद्धिकरी सर्वरोगेषु प्रशस्ता विशेषतः कुष्ठेषु** । ( र. २०.१११ )
एक सिद्ध औषध. हे नागार्जुनाने बनविले. हे पाचक, दीपक, हृदयाला हितकर, मेदनाशक, मळ शुद्ध करणारे, सर्व रोगात प्रशस्त आहे. विशेषतः कुष्ठरोगात अधिक उपयुक्त.

**—शिम्बी**—स्त्री., **वनस्पति० आरग्वधभेदः कर्णिकारः** ( ध. १.१२१ ) बहावा.

**—सागर**—पु., **सिद्धियोग०, पाण्डुरोगार्शःश्वास—शिरोरोगवमिज्वराग्निमान्द्योदावर्तघ्नः** ( र. १९.६९—७६ )
एक सिद्ध योग. पांडुरोग, मूळव्याध, श्वास, डोकेदुखी, वांती, ज्वर, अग्निमांद्य, वात वर चढणे हे रोग नाहींसे करतो.

**आरोग्यवृत्ती**—स्त्री., **आरोग्यस्य सातत्यम्** (चवि.३.३६)
सातत्याने आरोग्य असणे. सततारोग्य, नित्यनिरोगी, अखंडनिरोगी, सतत स्वस्थ, नित्यसुखी, सदासुखी, नित्यानंदी, स्वास्थ्य, सुख, आनंद यांचे सातत्य.

**आरोट**—पु., **पारदबन्ध० सम्यक् शोधितो रसः आरोटः कथ्यते, अयं क्षेत्रीकरणे श्रेष्ठः; शनैर्व्याधिविनाशनश्च** । ( र. ११.६७ )
वि., **शुद्धम्** । ( र. २९.२३ )
सम्यक् शुद्ध पारा. पारा चांगला शुद्ध केला की त्याला आरोट म्हणतात. हा शरीर उत्कृष्ट बनवून रोग नाश करितो.

**आरोहद्व्यधा**—वि., उपर्युपर्यारोपितशस्त्रपदा । ( सुशा. ८.१९ )
ज्या शिरेतून रक्तस्राव करावयाचा आहे तिच्यावर पुन्हा पुन्हा शस्त्राने जखमा केल्यावर तिला 'आरोहद्व्यधा' शिरा म्हणतात. धेनुका हे दुसरे नाव.

**आर्घ्य**—न., **मधु० अर्घा नाम मधुमक्षिकास्ताभिः संपादितं मधु आर्घ्यसंज्ञम्, तद्गुणाः—अतिचक्षुष्यं, कफपित्तहरं, रसे कषायं, पाके कटु, बल्यं, तिक्तमवातकृच्च** । ( सुसू. ४५.१३३—३८ )
**उष्णेन सहार्घ्यं न विरुध्यते । ( ड. )**
अर्घा जातीच्या मधमाशांनी जमवलेला मध. हा मध उष्णाबरोबर घेतला असता विरुद्ध होत नाही. **गुण**—तो डोळ्यांना अतिशय हितावह, कफपित्तहर, बलकारक, तुरट, कडु, पचल्यावर तिखट, थोडा वात करणारा, बलकर.

**आर्त**—वि., **पीडितः** ( सुसू. ४६.४४४ ) रोगी, पिडलेला.

**—गल**—पु., स्त्री., **वनस्पति० नीलसहचरः** ( सु. उ. १७.५१ ) निळी कोऱ्हांटी.
**कण्टकफलः** ( सु. उ. ९.१९ ) एरंड.
**ककुभः सुगन्धमूलः, 'कौहा' इति पूर्वदेशे प्रसिद्धः** । ( सुसू. ३८.१० )
सुगंधिमुळांचा अर्जुनसादडा.

**—गला**—स्त्री., **वनस्पति० नीलसहचरः** ( सुउ. १७.५१ )
**नीलसहचराख्य—आर्तगलगुणाः—कटुस्तिक्तः चक्षुष्यः**

**कफमारुतघ्नः शूलकण्डूकुष्ठव्रणत्वग्दोषशोफघ्नः**
( रा, १०.४१८-४२० )
निळा कोन्हांटा. निळी कोन्हांटी; **गुण**-तिखट, कडु, कफवातघ्न, डोळयास हितकर, शूल, खाज, कुष्ठ, व्रण, त्वचेचे दोष व सूजनाशक.

**आर्तव**-न., **स्त्रीगतोपधातु० शोणितं, रजः** ( सुशा. २.५ ) **स्त्रीबीजम्**। ( सुशा. २.३६ ) **शुक्रम्** ( सुसू. १४.१४३ ) रज. मासिक रक्त; मासिक, स्त्रीशुक्र, स्त्रीबीज.
**व्याख्या-रक्तमेव स्त्रीणां मासे मासे गर्भकोष्ठमनुप्राप्य त्र्यहं प्रवर्तमानमार्तवमित्याहुः** ( असंशा. १ ) **आर्तवस्य प्रतिमासं स्रावो भवति, द्वादशवर्षादारभ्य पञ्चाशत्पर्यन्तमत ऊर्ध्वं क्षयं याति** ( अहृशा. १.७ ) **शुद्धार्तवलक्षणम्-प्रतिमासमुत्पद्यमानं पिच्छदाहार्तिरहितं पञ्चरात्रानुबन्धि नातिबहु नात्यल्पं च।**
( चचि. ३०.२२५ )
**गुञ्जाफलपद्मालक्तकेन्द्रगोपसंकाशं च।**
( चचि. ३०.२२६ )
**शशरुधिरलाक्षारसोपमं धौतं च विरज्यमानं शुद्धम्।**
( असंशा. १.२० )
**क्षीणार्तवं नाम आर्तवस्य स्वप्रमाणहानिः; तल्लक्षणम्-यथोचितकालादर्शनमार्तवस्याल्पता योनिवेदना च**
( सुसू. १५.१२ )
**दुष्टार्तवमष्टविधम्-वातार्तवं, पित्तार्तवं, श्लेष्मार्तवं, रक्तेन कुणपार्तवं, श्लेष्मवाताभ्यां ग्रन्थ्यार्तवं, रक्तपित्ताभ्यां पूयार्तवं, मारुतपित्ततः क्षीणार्तवं, सन्निपातेन मूत्रपुरीषगंधि, ग्रन्थ्यार्तवं, पूतिपूयार्तवं, क्षीणार्तवं, मूत्रपुरीषार्तवं चासाध्यमन्यत्साध्यम्।**
( सुशा. २.५ )
**उपचितार्तवम्-काले मासेनोपचितमार्तवं वायुर्धमनीभ्यां योनिमुखं नयति, एतदीषत्कृष्णं स्निग्धं चास्ति।** ( सुशा. ३.१० )
**आर्तवादर्शनसंप्राप्तिः दोषावृतमार्गत्वादार्तवं नश्यति**
( सुशा. २.२१ )
**आर्तववहे द्वे स्रोतसी-तयोर्मूलं गर्भाशयः आर्तववाहिन्यश्च धमन्यः तत्र विद्धाया वन्ध्यात्वं मैथुनासहिष्णुत्वमार्तवनाशश्च।** ( सुशा. ९.१२ )
**आर्तव व्याख्या**-स्त्रियांना प्रत्येक महिन्याला गर्भाशयातून येऊन तीन दिवस योनीतून जे स्रवते ते रक्त. **काल**-वयाच्या बाराव्या वर्षापासून पन्नासाव्या वर्षापर्यंत ते दर महिन्याला स्रवते; नंतर ते क्षीण होते, । नाही. **शुद्ध आर्तव लक्षण**-बुळबुळीतपणा, दाह, पीडारहित, पांच रात्री स्रवणारे. अति नाही, फार कमी नाही, गुंजा, लाल कमळ, अलिता, मृगकिडा, सशाचे रक्त, लाख यांच्या सारखे लाल, त्याने भरलेले कापड धुतल्यावर डाग न रहाणारे शुद्ध आर्तव होय. क्षीण म्हणजे योग्य प्रमाणापेक्षां कमी आर्तव योग्य काळी न दिसणे व योनिवेदना. आर्तव दुष्टींचे प्रकार आठ, वातपित्तकफ दुष्ट ३ प्रकार, ४ रक्त दुष्टीने प्रेतासारखी दुर्गंधी, कफवाताने गाठाळ ६ रक्तपित्ताने पू युक्त, ७ वातपित्ताने क्षीण, संनिपाताने विष्ठा व मूत्र यांच्या सारखी घाण असते शेवटचे पाच असाध्य. पहिले तीन साध्य. **संचित आर्तव**-हे महिन्याने वायु धमनींनी योनिमुखाकडे नेतो ते थोडे काळे व स्निग्ध असते.
**अदृष्ट आर्तव**-दोषांनी मार्ग रुद्ध केला की ते दिसत नाही. **स्रोतसे**-दोन. त्यांचे मूळ गर्भाशय व आर्तववाहिनी धमन्या. त्या कापल्या गेल्यास वांझपणा येतो व संभोग सहन होत नाही व आर्तव नाश होतो.
वि., **यथोचितकालसंभवम्, वसन्ताद्यृतूद्भवम्।**
( चवि., ८.४ )
ज्या ऋतूत जे जे व्हावयाचे ते ते होणे, उचित काल निर्माण.

**-दुष्टि-**( दोषः ) स्त्री., **लक्षण० आर्तवविकारः**
( असंशा. १.३० )
रजोदुष्टि, रजोविकार. बीजदुष्टि, बीजविकार. शुक्रदुष्टि, शुक्रविकार.

**-वह**-वि., **गर्भाशयस्य रक्तवाहिन्यः**
( सुशा. ४.२४ )
गर्भाशयातील रक्त वाहणारी स्रोतसे.

**-वाहिनी**-वि., **गर्भाशयस्य रक्तवाहिन्यो धमन्यः**
( सुशा. ९.१२ )
गर्भाशयातील रजोवाहिनी धमन्या; बीजवाहिनी धमन्या.

**-विषा**-वि., **कीट० लूता, आर्तवे विषं यस्याः सा।**
( सुक. ३.५ )
जिच्या रजामध्ये विष असते त्या विषारी रजाच्या ( लूता ) नावाचे किडे.

**आर्तवादर्शन**-न., **लक्षण० आर्तवस्यादर्शनम्, गर्भोत्पत्तिलक्षणेष्वेकम्।** ( चशा. ४.१६ )
रज न दिसणे, रजःस्राव बंद होणे, गर्भधारणेचे एक लक्षण.

**आर्तवार्ति**–स्त्री., आर्तवरोगः ( सुशा. २.१३ )
रजाचे रोग, शुक्राचे रोग, बीजाचे रोग.

**आर्द्र**–न., वनस्पति० **आर्द्रकम्** । ( र. २२.८० )
आले. सुंठीचा ओला कांदा–कंद.

**–पाणिन्**–वि., **आर्द्रहस्तः; आर्द्रपाणिनमनुवासयेदित्यस्य भोजनादविलम्बितकालेऽनुवासयेदित्यर्थः ।** ( सुचि. ३७.५४ )
ओल्या हाताचा. जेवणानंतर हात धुतलेला. भोजन होतांच ( ओले हात असतांना ) अनुवासन–स्नेहबस्ति द्यावयाचा असतो.

**–पेशिका**–स्त्री., **आर्द्रकदीर्घखण्डम्** ।

**–माषा**–स्त्री., वनस्पति० **माषपर्णी** । ( ध. १.१३६ )
रानउडीद.

**–शाक**–न. वनस्पति०, **आर्द्रकम्** । ( ध. २.८५ )
आले. ताजी–ओली सुंठ.

**–संतानता**–स्त्री., **आर्द्रः करुणरसभावितत्वात् त्यक्तकाठिन्यः संतानश्चित्तवृत्ति–परंपरा यस्येत्यार्द्रसंतानः, तस्य भाव आर्द्रसंतानता, परमकारुणिकत्वम् । ( हे० )** ( अ.हृ.सू. २.४६ )
सतत करुणार्द्रता, सतत–केव्हाही पाझरणारे अंतःकरण असणे, सतत दयार्द्रता.
( चचि. २४.१७६ ) आल्याचे लांब तुकडे.

**आर्द्रक**–न., वनस्पति०, कन्द० **शुण्ठीविशेषः तद्गुणाः–कटूष्णं विपाके शीतलं लघु हृद्यं दीपनं रुचिदं स्वर्यं वृष्यं कफवातघ्नं शोफकण्ठरोगविबन्धानाहशूलघ्नम्** । ( ध. २.८४ )
**स्वादुपाकि** ( र. १७.११८–१२० )
एक कंद. ताजा सुंठीचा कंद; आलें. गुण–तिखट, उष्ण, पचण्यानंतर गोड, थंड, हलके, रुचकर, दीपक, हृदय, स्वर, शुक्र यांना हितकर, कफवातनाशक, सूज, कंठरोग, अवरोध, पोटफुगी, शूलनाशक.

**आर्द्रा**–स्त्री., **आर्द्रकम्, अतिविषा** । ( ध. १.११ )
आले. अतिविष.
वि., **अशुष्कम्, क्लिन्नम्** ( र. २३.७०–७४ )
ओला. भिजलेला. न सुकलेला.

**आर्द्राख्य**–न. वनस्पति० **आर्द्रकम्** । ( ध. २.८५ )
आले.

**आर्द्राञ्जन**–न., **रसाञ्जनम्, नेत्ररोगे प्रतिसारणार्थमुपयुज्यते** । ( सुउ. १३.६–८ )
रसांजन. दारुहळदीचा शिरा; नेत्ररोगात डोळ्यात घालण्यासाठी उपयुक्त.

**आर्द्रिका**–स्त्री., वनस्पति० **आर्द्रधानिका** ( अरुण ) **कुस्तुम्बरी** ( हे० अहृसू. ६.१०९ )
कोथिंबीर. ओले धणे.

**आर्य**–पु., **साधुवृत्तः** । ( असंसू. ८.४ )
चांगल्या वागणुकीचा, सद्वृत्त, सद्वर्तनी, सदाचारी, शालीन. चारित्र्यवान्.

**–परिग्रह**–वि., **आर्यः परिग्रहो नाम भार्यादिपरिवारो यस्य सः** । ( असंसू. ८.४ )
बायको मुले इत्यादि सद्गुणी परिवार असलेला.

**–प्रकृतिक**–वि., **आर्यस्य श्रेष्ठस्येव स्वभावो यस्य सः । उदारमनस्कः, उदात्तचरितः** ( चवि. ८.८ )
चारित्र्यवान् पुरुषाच्या स्वभावासारखा स्वभाव असलेला. उदार मनाचा, श्रेष्ठ चारित्र्याचा.

**आर्या**–स्त्री., **श्रेष्ठ, प्रजा** ( इं. असंउ. १ पृ. ४ )
श्रेष्ठ स्त्री, गुणवती, शालिनी, सुगृहिणी.

**–तारा**–स्त्री., देवताविशेषः ( असंसू. ८.९४ )
एक बौद्ध देवता.

**आर्यापराजिता**–स्त्री., विद्या० **एषा मातुर्बालकस्य च रक्षित्री** । ( असंउ. १ पृ. ४ )
बाळ–बाळंतिणीचे रक्षण करणारी देवता.

**आर्यापर्णशबरी**–स्त्री., विद्या० **एषा मातुर्बालकस्य च रक्षित्री** । ( असंउ. १ ( पृ. ४ )
बाळबाळंतिणीचे रक्षण करणारी देवता.

**आर्यावलोकितेश्वर**–पु., देवता० **चिकित्साद्यारम्भेऽसावर्च्यते** । ( असंसू. ८.९४ )
बौद्धांची एक देवता० चिकित्सा करतांना प्रथम पूजा करावयाची देवता.

**आर्ष**–वि., **सात्विककायेषु एकः ऋषिसत्वाधिष्ठितः** । ( चशा. ४.३७ (२)
सत्वगुणाचा, सात्विक, ऋषीच्या स्वभावाचा, सात्विक प्रकृतीचा, सात्विक प्रकृतीच्या व्यक्तींच्या प्रकारांपैकी एक.
**ऋषिकृतम्** । ( चसू. ३०.१७ ) ऋषींनी केलेले.

**–भी**–स्त्री., वनस्पति० **कपिकच्छूः** ( रा. ३.२०१ )
कवचबीज, खाजकुहिली.

**आल**–न., खनिज० **हरितालम्** ( ड. सुउ. ५२.२२ )
गोदंती हरताल, एकखनिज द्रव्य.
**वृश्चिकपुच्छकण्टकः** । ( सुक. ३.५ )
विंचवाच्या नांगीचा काटा, नांगी.

**–विषा**–स्त्री., लूता० ( सुक. ८.१०९-११० )
एक प्रकारची लूत. विषारी कीटक.

**आलक**–न., खनिज० **हरितालम्** । ( र. ९.७४ )
हरताळ.
**वनस्पति० शालिपर्णीविशेषः** ( ध. १.८८ )
सालवण. विशेषप्रकारची सालवण.

**आलक्तक**–न., **अङ्गरागोपयोगिद्रव्य० अलक्तकम्**
उटणे किंवा नखे इ. रंगवण्याचे द्रव्य. अळता. अळिता. लाखेचा रस.

**आलभ्य**–वि., **वध्यः, आलभनयोग्यः** । ( चवि. ८.५४ )
वध्य, वध करण्यास योग्य.

**आलम्बन**–न., **आधारः** । ( सुशा. ५.५३ )
आश्रय, आधार.

**आलम्भ**–पु., **मारणम्, यज्ञीयबलिः, हिंसनम्** ।
( चचि. १९.४ )
यज्ञांतला बळी. मारणे. ठार मारणे.

**आलर्क**–वि., **उन्मत्तसारमेयसंबन्धि विषादि** ।
( असंउ. ४६, पृ. ३८१ )
पिसाळलेल्या कुत्र्याचे विष इत्यादी.

**आलस्य**–न., लक्षण० **कर्माभावः** । ( चचि. ३.२८-२९ )
**शक्तस्यापि कर्मण्यनुत्साहः** । ( र. १९.४४ )
काम करण्याची क्षमता असूनही ते करण्याची प्रवृत्ति नसणे. कार्यक्षमता असून अप्रवृत्ति. समर्थाचा अनुत्साह.

**आलाल**–वि., **लालेव, समन्ताल्लालारूपम्** ।
( चनि. ४.२२ ) लाळेसारखे.
**–मेह**–पु., **प्रमेहभेदः, कफदोषप्रधानः** (चनि. ४.१०)
**वाग्भटे अयं 'लालामेहः'** ।
( अहृनि. १०.१३; असंनि. १० )
प्रमेहाचा एक प्रकार. कफदोषप्रधान प्रमेह. वाग्भटात याला लालामेह असे नाव आहे.
**अस्मिन् प्रमेहे मूत्रं लालेव तन्तुयुतं पिच्छिलं भवति** । ( चनि. ४.२२ )
ह्या रोगात लघ्वी लाळेप्रमाणे तंतुयुक्त व बुळबुळीत होते.

**आलिकन्द**–पु., वनस्पति० **मालाकन्दः** ।(रापरि. ७.४४)
मालाकन्द.

**आलु**–पु.,न., वनस्पति० **कन्दविशेषः** । (चसू. २५.३९ )
अळू.
**इदं रक्तपित्तहरं शीतं मधुरं गुरु बहुशुक्रकरं स्तन्यवृद्धिकरं च** ( सुसू. ४६.२९८–९९ )
**गुल्मे वर्ज्यम्** । ( सुउ. ४२.७५–७६ )
हा गोड, रक्तपित्तनाशक, थंड, जड, पुष्कळ शुक्र वृद्धि करणारा, अंगावरचे दूध वाढविणारा, गुल्मरोगात वर्ज्य.
**कासालुः** । ( रा.परि. ७.२८ ) कासालु.

**आलुक**–पु, न., **आलुः** । ( चसू. २५.३९ )
**आलुकं कन्दानामहिततमम्** ।
अळू. सर्व प्रकारच्या कंदात अहितकारक.

**आलुड्**–क्रि., **विलोडन** । ( सुसू. ४३.३ )
आलोडणे. घुसळणे, घोटणे, घोटून एकजीव करणे.

**आलूक**–न., वनस्पति०, **एलवालुकम्** । ( ध. ३.७६ )
कवठासारखे सुगंधी खरबूज.

**आलेप**–पु., उपक्रम० **लेपः** । ( सुसू. १८.६ )
एक उपचार. लेप; प्रलेप.

**आलेपन**–न., उपक्रम० **लेपः** ( चसू. १.९० )
लेप करणे, लेप, प्रलेप, एक उपचार.

**आलोचक**–पु., **दृष्टिस्थोऽग्निः स एवाऽऽलोचकपित्तमित्युच्यते** । ( सुसू. २१.१० )
नेत्रेंद्रियातील अग्नि तोच आलोचक पित्त.
न., पित्त० **दृष्टिस्थं रूपालोचनाच्चालोचकम्** ।
( असंसू. २०.५ )
दृष्टीच्या ठिकाणी असणारे पित्त. आलोचन म्हणजे रूपदर्शन करणारे म्हणून आलोचक.
खनिज० **कान्तलोहप्रकारः** ( ध.६.२९ )
लोहचुंबक. लोहाचा एक प्रकार.

**आलोडन**–न., **द्रवीकरणम्, द्रुतत्वापादनम्** ।
( चचि ७.४५ ) आर्द्र करणे. पातळ करणे.
**मज्जनम्** ( र.२.१५७ )
बुडवणे, भावना देणे.

**आवन्तिक**–वि., **अवन्तिदेशस्थितो जनः । आवन्तिकाः तैलाऽम्लसात्म्याः** । ( चचि. ३०.२९७ )
अवन्ति माळव्याची राजधानी. आवन्तिक म्हणजे माळव्याचे रहिवाशी; ह्यांना अधिक तेल आणि आंबट खाण्याची सवय आहे.

**आवरण**–न., **अवरोधः, गतिनिरोधः** ( चचि. २८.५९ )
अवरोध. गती अडवणे.

**आवर्त**–पु., **वर्तुलम्, मण्डलम्** । ( सुशा. ५.४३ )
गोलार्ध, गोल, मण्डल.
**मर्म० स्थानम्ः–भ्रुवोरुपरि संख्या–द्वौ आवर्तौ मानम्–अर्धाङ्गुलम्; प्रकारः–सन्धिमर्म, वैकल्यकरं च विद्धलक्षणम्–आन्ध्यं दृष्ट्युपघातो वा** ।
( सुशा. ६.६ )

एक मर्मस्थान–भुंवयीच्या वर; यावर आघात झाला तर दृष्टीला मांद्य किंवा आंधळेपणा येतो.

**कीट० वातप्रकोपणोऽयम्** । ( असंउ. ४३ )
एक किडा. याच्या दंशाने वातप्रकोप होतो.

न., **खनिज० माक्षिकम्** ( **हेममाक्षिकम्** ) ( ध. ३.१४८ ) खनिजद्रव्य–सुवर्णमाक्षिक.

**आवर्तक**–पु., **भ्रमिः** ( चइ. ८.६ ) भोंवरा.

**कीट० अष्टादश वायव्यकीटेष्वेकः** (सुक. ८–६–८)
१८ वातप्रकोपक कीटकांपैकी एक किडा.

**आवर्तकी**–स्त्री., **वनस्पति० कषाया; अम्ला; शीता; वृष्या; ऊर्ध्वाधोदोषनाशिनी, पित्तघ्नी, अतिसार-कुष्ठघ्नी च।** ( ध. १.१९८ )

चांभार आवळी, चांभार तरवड; गुण–तुरट, अम्ल, शीत, धातुवर्धक, ऊर्ध्व व अधोदोषनाशक, पित्त, अतिसार व कुष्ठनाशक.

**वनस्पति० अरणी** । ( ध. १.२२५ ) टाकळी.

**वनस्पति० दन्तीभेदः, लता.** ( असंचि. २१ )
एक लता. दातीचा एक प्रकार.

**नेत्ररोगेषु लिङ्गनाशोपद्रवविशेषः, श्वेतारुणा आवर्तवद् अनवस्थिता तारा एनां न विध्येत्** । ( असंउ. १७ )

नेत्ररोगात एक उपद्रव. पांढरी तांबुस, भोवऱ्यासारखी चंचल नेत्रतारका हिचा वेध करूं नये.

**आवर्तन**–न., **संस्कार०** ( **परिव.** ) **द्रवीकरणम् द्रावयित्वा मर्दनेन एकीकरणम्–गालनम्** । ( र. ११.११० )

एक संस्कार. पातळ करणे, गाळणे. पातळ करून एकत्र करून मिसळणे, खलणे.

**आवसथ**–पु., न. **गृहम्** । ( चचि. १. [ २ ] ११ )
घर.

**आवस्थिक**–वि., **विकारविशेषितः बाल्याद्यवस्थाविशेषितः** ( **कालः** ) ( चवि. १.२२ ( ६ )
रोगाचा विशेष ( काल ). बाल्य इत्यादि अवस्थेचा विशेष काल.

( **आवस्थिकी** )–स्त्री., **तत्तदवस्थाविशेषे प्रयोगोचिता ( चिकित्सा क्रिया वा )** ( चचि. १५.१९८ )
**अवस्थानुरूपा चिकित्सा** । ( चचि. २९ १६५ )
त्या त्या विशेष अवस्थेला अनुसरून जी चिकित्सा करणे आवश्यक असते ती चिकित्सा किंवा क्रिया.

**आवान**–वि., **शुष्कम्** । ( चसि. ६.८० )
शुष्क होणे, सुकणे, सुकलेले.

**आवाप**–पु., **प्रक्षेपः स्नेहादिषु द्रव्यप्रक्षेपः** ( चचि. २८.१७१ )

**द्रुते लोहादौ द्रव्यान्तरस्य प्रक्षेपः** ( र. ८.५४ )
तेल तूप इ. स्नेहात तो सिद्ध करितांना घालावयाचा कल्क, चटणी.
लोह, सोने, रुपे इत्यादी धातूंच्या रसात इतर द्रव्य घालणे.

**आवास**–पु., **संस्कारानन्तरं पुनः पूर्वस्वभावं प्राप्तः पारदः** । ( र. ८.१७ )
संस्कारानंतर पुनः पहिली स्थिती प्राप्त झालेला पारा.
संस्कारापूर्वीसारखा झालेला संस्कारानंतरचा पारा.

पु., **आश्रयः अधिष्ठानम्** । ( अहृशा. ३.९३ )
आश्रय. अधिष्ठान. आधार.

**आविक**–वि., **अविः प्राणिविशेषः उरभ्रः तस्येदमाविकम्** । ( चसू. २७.६२ )

अवि म्हणजे मेंढी म्हणून मेंढीचे ते आविक.

न., **उरभ्ररोमव्यूतं वस्त्रम्, कम्बलः** ( सुसू. १८.१६ )

मेंढीच्या केसांचे ( लोकरीचे ) विणलेले वस्त्र, कांबळा, रग, शाल, इत्यादी.

**–शाटक**–पु., न., **कम्बलः** ( चसू. १४.३७ )
कांबळा, रग, शाल इत्यादी.

**आविघ्न**–पु., न., **वनस्पति०–करमर्दकम्** ( ध. ५.१०२ )
करवंद.

**आविद्ध**–वि., **वक्रम्** । ( चवि. ८.२० ) वांकडे.

**शिरस्क**–वि., **ताडितशिरस्कः** । ( चनि. ८.८१ )
वाकड्या मानेचा–डोक्याचा; भिंत इत्यादीवर डोके आपटलेला.

**आविल**–वि., **घनम्, कलुषम्, समलम्** ( अहृसू. २७.४१ सुउ. ६.१२ )

घट्ट. गढूळ. मळयुक्त.

**–दर्शन**–न., **लक्षण० आकुलदर्शनम्** ( सुउ. ६.२६ )
गढूळ दृष्टि, भुरकट दिसणे.

**–मूत्र**–वि., **लक्षण० कलुषमूत्रलक्षणः** ( सुनि. ६.२६ )
गढूळ लघ्वी होणे हे लक्षण असलेला.

**–मूत्रता**–स्त्री., **लक्षण० कलुषमूत्रता** ( अहृनि. १०.७ ) गढूळ लघ्वी होणे.

**–लोचन**–वि., **लक्षण० दूषिकास्राभ्यां मलिने लोचने यस्य** । ( सुक. ५.४१ )
एक लक्षण. मळ व रक्त यांनी गढूळ डोळे ज्याचे आहेत तो.

**आविलाक्ष**–वि., **लक्षण० ओदनमण्डवदश्रुपूर्णेक्षणः ।**
एक लक्षण. भाताच्या पातळ पेजेसारखे अश्रुयुक्त डोळे ज्याचे आहेत तो.

**आविष्ट**–वि., **ग्रस्तः** ( सुचि. ३६.७ )
युक्त; भरलेला, पिडलेला.

**आवी**–स्त्री., **प्रसववेदना, गर्भनिष्क्रमणकाले जायमानः शूलविशेषः ।** ( सुशा. १०.९ चशा. ८.३७ )
**योनेर्मूत्रकफप्रसेकादीन्यावीलिङ्गानि वा**
( सुनि. ८.१२ )
प्रसूतीच्या वेदना. गर्भ बाहेर येण्याचे वेळी होणाऱ्या वेदना; योनीतून मूत्र कफ इत्यादी प्रकारचा स्राव येणे.

**आवृत**–**अभिसर्पता बलवता दोषेण अभिभूतो दुर्बलो दोषः प्रत्यावृत्तः सन् 'आवृतः' इत्युच्यते**
( सुचि. ५.२९ ङ; चचि. २८.६५ )
**आच्छादितः** ( र. १२.५ )
संचारी व बलवान दोषाने दुर्बल दोषाला अडवले की तो दुर्बल दोष आवृत झाला असे म्हणतात. आच्छादित.

**–गति**–वि., **रुद्धगतिः** ( चसू. १७.८० )
ज्याची गती अडवली आहे तो.

**–मार्ग**–वि., ( परिव० ) **प्रतिबद्धमार्गः ।**
( सुशा. २.२१ ) ज्याचा मार्ग अडवला आहे.

**–मार्गत्व**–न., **अवरुद्धगतित्वम् ।** ( चसू. २१.५ )
गती ( मार्ग ) अडवलेली स्थिती.

**आवृत्ति**–स्त्री., **आवरणम् ।** ( र. २१.१८५ )
आवरण. झाकण. आच्छादन.

**आवेगी**–स्त्री., **वृद्धदारुकः ।** ( ध. ४,१०७ ) वरधारा.

**–आवेधन**–( परिव० ) न., **ताडनम्, आघातः**
( अहृउ. ७.१० ) ठोकणे. मारणे, आघात करणे.

**आवेश**–पु., **पिशाचराक्षसग्रहादिभिर्ग्रहणम्, येन अपस्मारोन्मादादयो विकाराः संजायन्ते** ( र. २३.६ )
पिशाच्च, राक्षस, ग्रह इत्यादींनी धरणे; याने अपस्मार उन्माद इत्यादी विकार उत्पन्न होतात.
**परपुरशरीरप्रवेशः, योगिनामैश्वरबलविशेषः ।**
( चशा. १.१४१ )
दुसऱ्याच्या शरिरात प्रवेश ही योग्यांची एक दिव्य शक्ति आहे.

**[आवे]शन**–न., **भूतविद्यासमुद्दिष्टोपचारविशेषः समन्त्रसर्षपादिभिस्ताडनम्, भूताभिषंगोत्थज्वरे त्रय[उप]चाराः—बन्धः, आवेशनं, पूजनं च ।**
( सुउ. ३९.२६५ )
भूतविद्या नावाच्या शास्त्रात सांगितलेले विशेष उपचार; मंत्र म्हणून मोहरी इत्यादि द्रव्ये रोग्याच्या शरिरावर जोराने फेकावयाची, त्यांचा मारा करावयाचा; हे उपचार ३ प्रकारचे बंधन, आवेशन, पूजन.

**आव्यध**–क्रि., **ताडने ।** ( अहृउ. ७.९० )
आदळणे, ठोकणे, हाणमार करणे.

**आशय**–पु., **शारीर० अवस्थानविशेषः अधिष्ठानं सञ्चयस्थानम्, आधारः** ( सुशा. ५.८ )
द्रव्याचे आधिक्याने अस्तित्व असलेले स्थान. मूलस्थान. उत्पत्तिस्थान. संचयस्थान, आधार.
**शरीरधात्ववकाशः स्रोतो वा आशयः**
( चवि. ५.९ )
शरीरधातूंच्या अस्तित्वाचे अवकाशरूप स्थान किंवा स्रोतस रूपाने असलेले स्थान.
**पुरुषाणामाशयाः सप्त–वाताशयः, पित्ताशयः, श्लेष्माशयो, रक्ताशयः, आमाशयः, पक्वाशयो, मूत्राशय इति स्त्रीणां तु अष्टमोऽधिको गर्भाशय इति** ( सुशा. ५.८ )
**शार्ङ्गधरे स्त्रीणां त्रयोऽधिका आशयाः उक्ताः धराशयः ( गर्भाशयः ) स्तन्याशयौ च ।**
( शार्ङ्गधर प्रथमखंड )
**काश्यपसंहितायां तु 'विण्मूत्रक्रिमिपक्वामकफवाताशया इति पूर्वतः किञ्चित् भेदेन सप्ताशया गणिताः** ( काखिल. ९.१६ )
पुरुषांचे आशय सात. वात, पित्त, कफ, रक्त, आम, पक्व, मूत्र असे सात आशय. स्त्रीला एक अधिक गर्भाशय तो आठवा. शार्ङ्गधरात स्त्रियांचे तीन आशय अधिक सांगितले आहेत. गर्भाशय व दुधाचे दोन आशय–स्तन. काश्यपाने विष्ठा, मूत्र, क्रिमि, पक्व, आम, कफ व वात यांचे मिळून सात आशय सांगितले आहेत.

**–संभव**–पु., **आशयानामुत्पत्तिः वायुराशय्य आसमन्तात् निवासं कृत्वाऽभ्यासयोगेनाऽऽशयसंभवं करोति ।** ( सुशा. ४.३० )
आशयाची उत्पत्ति–वायु मांसादि धातूंमध्ये रहातो व हळू हळू सतत पोकळी निर्माण करून आशयाची उत्पत्ती करतो.

**आशादिरिपुसंभव** पु., **निर्यास० भूमिजो गुग्गुलुः**
( रा. १२.१८८ )
जमिनीतून निघणारा एक–सत्ववान् पदार्थ. एक प्रकारचा गुग्गूळ.

**आशिस्**—स्त्री., आशंसनम् , आशीर्वादः प्रशंसा ।
( सुचि. १९.६९ )
आशीर्वाद, प्रशंसा, मंगलकामनासूचक वाक्य.
**फलश्रुतिः** ( च.चि. १ ( २ ) ९ )
फळ, परिणाम, लाभ, उपयोग, नफा.

**आशीविष**—न., **मूलविषम्** । ( असंउ. ४१ इन्दु )
पु., **दर्वीकरसर्पविशेषः भौमः** ।
( सुक. ४.३४ ( ९ )
**दृष्टिनिश्वसनादिभिः, परमाशासनेन इच्छामात्रेण वाऽशुघातको दिव्यः सर्पः** ।
( चचि. २३.१६० )
एक विषारी मूळ. एका जातीचा जमिनीवर राहाणारा सर्प. नागजातीचा एक साप. दृष्टी, निश्वास, इत्यादी किंवा केवळ इच्छेने जो ताबडतोब घात करतो असा दिव्य सर्प.

**आशीविषोपम**—वि., **सद्योमारणे आशीविषदिव्यसर्पसमाः, श्मशानचैत्यवल्मीकाश्रयाः चक्रवज्रगदाकुन्तत्रिशूलजटाधराः, रक्तास्यनयना ये भौमसर्पास्ते आशीविषोपमाः सन्ति** । ( असंउ. ४२ )
आशीविषा सारखे. अतिभयंकर विष असलेल्या दिव्य सर्पासारखे चक्र, वज्र, गदा, त्रिशूळ, जटा धारण करणारे, लाल डोळे व तोंड असलेले जे जमिनीवरचे सर्प ते भयंकर विषाचे असतात; तत्कालप्राणहारक.

**आशु**—( अव्य०, ) **शीघ्रम्** ( सुक. २.२२ )
लवकर, जलद, जल्दी-त्वरेने, घाईने, ताबडतोब.
वि., **विषगुणः शीघ्रं प्राणहननकारि** ( सुक. २.१९ )
लवकर प्राण घेणारा, ठार मारणारा.
**द्रव्यगुणः तैलं यथाऽम्भसि तथा देहे शीघ्रं धावमानः** । ( **भाव. पूर्वखण्ड** )
तेल जसे पाण्यात तसा शरिरात त्वरित पसरणारा.

**–कर**—वि., **शीघ्रघाती** । ( अहउ. ३५.७ )
लवकर जीव घेणारा.

**–कारिन्**—वि., **रोगगुणः दोषगुणो वा**
( सुनि. १.९ अहनि. ३.१७ )
रोगाचा वा दोषाचा गुण. शीघ्र परिणामकारी.
**शीघ्रमत्ययकारी, य आशु शरीरघातं करोति** ।
( चनि. २.११ )
लवकर शरिराचा नाश करणारा. जीव घेणारा.
**द्रव्यगुणः**—**तैलं यथाऽम्भसि तथा देहे शीघ्रं धावमानः** ( सुसू. ४६.५२४ )
द्रव्याचा गुण—तेल जसे पाण्यावर टाकताच ताबडतोब पसरते तसेच जे द्रव्य ताबडतोब सर्व शरिरात पसरते ते.

**–कारितर**—वि., **अतिशीघ्रं प्राणात्ययकारी**
( असंउ. ४० )
अतिशय त्वरेने प्राण नाश करणारे.

**–कोपित**—पु. **व्रीहिः** ( रा. १६.११२ )
तांदुळाचा एक प्रकार.

**–क्रिया**—स्त्री., **लघुहस्तता, शीघ्रशस्त्रकर्मकरणम् , शस्त्रवैद्यस्य गुणः; आशुक्रियया रोगिणः क्लेशो न भवति** ( सुसू. ५.१० )
हा शस्त्रवैद्याचा गुण आहे. हलक्या हाताचा, **शस्त्रक्रिया लवकर करणारा**. या योगाने शस्त्रक्रिया **चटकन** होते व रोग्याला क्लेश होत नाहीत.

**–ग**—वि., **शीघ्रगामी** । ( चचि. २४.३० )
त्वरेने जाणारा, शरिरात पसरणारा.

**–घातिन्**—वि. **आशुमारकम्** । ( सुक. ३.३९ )
त्वरेने प्राणनाश करणारा.

**–जा**— वि)., **शीघ्रं जायमाना** । (सुनि. १४.६ )
लवकर उत्पन्न होणारी

**–त्व**—न., **आशुगत्वम्, शीघ्रप्रसरणशीलता** ।
( सुसू. ४६.५२४; सुउ. ४७.५ )
त्वरेने जाणे, त्वरेने पसरणे.

**–पाकिता**—स्त्री., **शीघ्रपाककारित्वम्** ।
( अहसू. ९.१८ )
झटकन पिकण्याचा स्वभाव, गुण.

**–भावन**—न., **आशुगत्वम्, शीघ्राविष्करणशीलता** ।
( चचि. २४.३२ )
त्वरेने जाणे—जाण्याचा गुण. **झटकन व्यक्त करण्याचा** स्वभाव.

**आश्चोतन**—न., **नेत्ररोगेषु उपक्रम० अक्षिपूरणम् नेत्रे औषधबिन्दुपातनं परिषेको वा**
( चचि. २६.२३९; सुउ. ९.४ )
नेत्ररोगावरचा एक उपक्रम-उपचार. **डोळ्यात** औषधाचे थेंब घालणे, डोळ्यावर **औषध शिंपडणे**. त्याचे सिंचन करणे. प्रोक्षण करणे, **किंवा डोळ्या**भोवती पाळी तयार करून डोळा बुडेल **इतके औषध** पाळीत घालणे.

**–विधि**—पु.; **निवातस्थानस्य तस्य आतुरस्य वैद्यो वामेन पाणिना लोचनमुन्मील्याऽपाङ्गदेशे भाज**

निधायाऽन्येन नाम दक्षिणकरेण पिचुवर्त्या शुक्त्या प्रलम्बमानया दश द्वादश वा बिन्दून् द्व्यङ्गुलात् नातिनिकटात् नातिदूरात् कनीनिकेऽवसेचयेत् । अनन्तरं कोमलेन वस्त्रखण्डेन शोधयित्वा चैलेन कोष्णजलप्लुतेनाऽक्षि मृदु स्वेदयेत् । तत्रापि वात-कफयोः स्वेदनं पित्तरक्तयोस्तु शीतमिति ।
(अहसू. २३.२–६)

स्नेहन–लेखन–रोपणभेदेन त्रिविधमाश्चोतनमुक्तम्, लेखने सप्ताऽष्टौ वा बिन्दवः, स्नेहने दश बिन्दवो, रोपणे तु द्वादश ।

औषधधारणकालः–लेखनं वाक्शतं धार्यम्, स्नेहनं द्वे वाक्शते धार्यम्, रोपणं तु त्रीणि वाक्शतानि ।
(सुउ. १८.४६)

रोगी निवांत जागी घेऊन त्याला निजवून त्याच्या डोळ्याच्या बाहेरच्या कोपराजवळ एक भांडे ठेवणे; वैद्याने डाव्या हाताने डोळा उघडून उजव्या हाताने शिंपीत औषध घेऊन तिला कापसाची लोंबती वात जोडून दोन अंगुळावर तिचे शेवटचे टोक धरून (अति जवळ किंवा अतिदूर न धरतां) औषधाचे दहा बारा थेंब बुबुळावर सोडावेत. नंतर अगदी मऊ फडक्याने ते पुसून, दुसऱ्या बोळ्याने कोमट पाण्याने डोळा हळुवार शेकावा; असे वातकफ दोषावर शेकावे, रक्त आणि पित्तावर थंड उपचार करावा.

**आश्चोतन प्रकार ३**–स्नेहन, लेखन, रोपण. लेखनाकरिता सात आठ बिंदु, स्नेहनाकरिता दहा बिंदु, रोपणाकरितां बारा बिंदु उपयोगात आणावे.

**औषध धरून ठेवण्याचा वेळ** लेखन औषध शंभर, स्नेहनाकरिता दोनशे, व रोपणाकरिता तीनशे अक्षरे उच्चारणाचा वेळ असावा.

**आश्चोतनाञ्जनविधि**–पु., अध्यायसंज्ञा०
(अहसू. २३.१)
डोळ्यात अंजन घालणे व इतरही आश्चोतनासारखे उपचार करणे यांचा विधी सांगितलेला अध्याय.

**आश्मरथ्य**–पु., ऋषि०, रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः (चसू. १.१०)
रोगोपचारांच्या उपायांचा विचार करण्यासाठी जमलेल्या ऋषींपैकी एक ऋषि.

**आश्रम**–पु., तपस्विनां निवासस्थानम् (सुशा. ३.२४)
तपस्वी ऋषि मुनि यांचे निवासस्थान.
जीवनवृत्तिमुद्दिश्य कृत आयुषो भागविशेषः ब्रह्मचारि-गृहस्थ-वानप्रस्थ-यतयश्चत्वार आश्रमाः ।
(सुसू. २९.५)
जीवनयात्रा चालविण्याच्या उद्देशाने आयुष्याचे केलेले चार विशिष्ट भाग. (१) ब्रह्मचर्याश्रम (२) गृहस्थाश्रम (३) वानप्रस्थाश्रम आणि (४) संन्यासाश्रम.

**आश्रय**–पु., अधिष्ठानम् । (चचि. ३.३५)
आधार. आसरा; अवलंबस्थान.

**आश्लेष**–पु., परिष्वङ्गः, आलिङ्गनम् । (अहसू. ७.६७)
आलिंगन, संबंध. कवटाळणे, मिठी मारणे.

**आश्वबल**–वि., अश्वबलाया इदम् । (सुसू. ४६. २६१)
मोठ्या पानांची मेथी.

**आश्वयुज**–पु., आश्विनमासः । (अहसू. ५,४)
आश्विनमास.

**आश्वलायन**–पु., ऋषि० रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः (चसू. १.९)
रोगहरण चिंतक एक ऋषि. आश्वलायन ऋषि.

**आश्वास**–पु., आश्वासनम्, आश्वासो बलकराणां श्रेष्ठः ।
(असंसू. १३.३)
आश्वासन देणे. धीर देणे, ग्वाही देणे.
कबूल करणे; आश्वासन बल–शक्ति निर्माण करणाऱ्या कारणात श्रेष्ठ आहे.
**सांत्वन** (सुशा. २.२८)
शांत करणे, दुःख कमी करणे, राग कमी करणे.

**–कर**–वि., सान्त्वनकरम्, प्राणबलकरम्, उदकमाश्वासकराणां श्रेष्ठम् । (चसू. २५.४०)
सांत्वन–शांत करणारे, दुःखनिरसन करून धीर देणारे, प्राणाला बलदायक, क्रोध कमी करणारे, पाणी हे आश्वासन (शांत) करणाऱ्या सर्व द्रव्यात श्रेष्ठ आहे.

**–जनन**–वि., मार्गादिशुष्कदेहानां प्राणजननम्
(सुसू. ४५.३)
चालण्याच्या व इतर श्रमाने थकलेल्यांना शक्तिदायक.

**आश्वासन**–न., उपक्रम० यथा योनियन्त्रपीडितस्य जातमात्रस्य शिशोर्मूर्च्छानिवारणार्थं प्राणजननार्थं प्राणानां प्रत्यानयनाय वा शीतेन जलेन सेचनम् ।
(सुशा. १०.१३)
हा एक उपचार आहे. प्रसूति होताना त्रास झाला असल्यास किंवा योनियंत्राने बालकाचे डोके दाबले गेले असल्यास किंवा त्याला आलेली मूर्छा नाहीशी व्हावी, त्याला हुशारी यावी, प्राण गेला असे दिसत असतां तो परत यावा आणि बल यावे म्हणून थंड पाण्याने सिंचन करणे.

**आसंग**–पु., रसाञ्जनम् । ( असंउ. ३० )
रसाञ्जन; रसौत.

**आसंगिम**–पु., उपक्रम० विशेषः पञ्चदशकर्णबन्धेष्वेकः । ( सुसू. १६.१० )
एक उपचार, साधन. पंधरा कर्णबंधांपैकी एक बंध.

**आसन**–न., उपवेशनम्, उपविष्टस्य स्थितिः ( सुसू. १९.१२ )
बसणे, बैठक, चटई. सतरंजी, पाट इत्यादि बसण्याची वस्तु. पद्मासन इत्यादि योगासने.

**आसन्दी**–स्त्री., आसन० ( काखिल. ११.२० )
लहान खाट, खुर्ची.

**आसन्नप्रसवा**–वि., अद्य वा श्वो वा आसन्नः प्रसवः यस्याः सा ( गर्भिणी ) ( अहशा. १.७४ )
आज उद्या बाळंत होण्याचा संभव असलेली. ( गर्भिणी )
**तस्याः लक्षणानि–क्लमो ग्लानिर्मुक्तबन्धने इव अक्षिणी निष्ठीविकामूत्रपुरीषबाहुल्यं शिथिलकुक्षिताऽधोगुरुत्वम् । अनन्नाभिलाषः उदरहृदयकटिबस्तिवङ्क्षणेषु वेदना, योन्यां च तोदभेदशूलस्फुरणस्रवणानि भवन्ति । तदनन्तरम् आवीनां प्रादुर्भावो गर्भोदकप्रवाहश्च ।** ( असंशा. ३.१६ )
आज उद्या बाळंत होणारीची लक्षणे–थकवा, ग्लानी, डोळे सुजल्याप्रमाणे वाटणे, थुंकी अधिक, लघवी व शौचाला अधिक होणे, कुशी ढिल्या वाटणे, ओटीपोटात खाली जड वाटणे, अन्नाची इच्छा नाहीशी होणे, पोट, हृदय, कंबर, बस्ति, जांघ यात वेदना, योनीत टोचणी, फूट, शूल, स्फुरण व स्राव होतो नंतर वेणा येतात व गर्भोदकाचा प्रवाह सुरू होतो.

**आसव**– पु., न., मद्यम्, आसवाश्च नानाविधौषधक्वाथगुडादि कृत्वा धातक्यादिचूर्णाधिवासिताः । ( सुचि. ६.२१ ).
**यद् अपक्वौषधाम्बुभ्यां सिद्धं मद्यं स आसवः ।** ( शाम. १०.२ )
नानाप्रकारच्या औषधांचा रस, काढा, गूळ इत्यादी द्रव्ये आणि धायटी इत्यादी चूर्णे एकत्र करून भांड्याचे तोंड बांधून धान्यराशीत विशिष्ट काल ठेवल्यानंतर तयार झालेला कल्प. कच्चे औषध व पाणी यांचेपासून तयार होणारे ते आसव, व काढ्यापासून तयार होणारे ते अरिष्ट.



**–द्रु**–पु., तालः ( रा. ९.९३ ) ताडवृक्ष.

**–योनि**–स्त्री., आसवकारणम्, येन आसवः निर्मातुं शक्यस्तत्, धान्य-फल-मूल-सार-पुष्प-काण्ड-पत्र-त्वचोऽष्टौ चाऽऽसवयोनयः शर्करानवमीकाः एवं नवधान्यासवाः, सुरा-सौवीर-तुषोदक-मैरेय-मेदक-धान्याम्लाः षट्; फलासवाः षड्विंशतिः–मृद्वी-काखर्जूर-काश्मर्यधन्वन-राजादन-तृणशून्य-परूषकाऽभयाऽऽमलक-मृगलिण्डिका-जाम्बव-कपित्थ कुवल-बदर-कर्कन्धु-पीलु-प्रियाल-पनस-न्यग्रोधाऽश्वत्थ-प्लक्ष-कपीतनोदुम्बराऽजमोद-शृङ्गाटकशङ्खिनीफलासवाः ।
मूलासवा एकादश-विदारिगन्धाऽश्वगन्धा-कृष्णगन्धा-शतावरी-श्यामा- त्रिवृद्-दन्ती-द्रवन्ती-बिल्वोरुबूक-चित्रकमूलाद्याः । सारासवा विंशतिः–शालप्रियका-अश्वकर्ण-चन्दन--स्यन्दन--खदिर--सप्तपर्णोऽर्जुनाऽसनाऽरिमेद-तिन्दुक---किणिही--शमी--शुक्ति-शिंशपा-शिरीष-वञ्जुल-धन्वन-मधूकाद्याः । पुष्पासवा दशः–पद्मो-त्पल-नलिन--कुमुद-सौगन्धिक-पुण्डरीक-शतपत्र-मधूक-प्रियङ्गु-धातकीपुष्पैर्दश; काण्डासवाश्चत्वारः--इक्षु--काण्डे-क्षिवक्षुबालिका-पुण्ड्रकाः ।
पत्रासवौ द्वौ–पटोल-ताडकपत्रासवौ । त्वगासवाश्चत्वारः–तिल्वक-लोध्रै-लवालुक-क्रमुकसम्भवाः । शर्करासव एकः, एवं चतुरशीतिरासवा भवन्ति । ( चसू. २५.४९ )

**आसवाची कारणरूप द्रव्ये**–धान्ये, फळें, फुले, मुळे, नार, कांडी, पाने, साली ही आसवाची आठ द्रव्ये होत व नववे साखर अशी नऊ **धान्यासवे** होत. सुरा, सौवीरक, तूस काढलेल्या जवाचे तुषांचा आंबट द्रव, मैरेय, मेदक, ( पांढरी दारू ) व कांजी ही ६ धान्याम्ले. फलासवे सव्वीस-मनुक, खजूर, शिवणफळ, धामणी, खिरणी, केवडीची फळे, फालसा, हिरडा, आवळा, जांभूळ, कवठ, मोठे बोर, मध्यम बोर, लहान बोर, पीलु, चारोळी, फणस, वड, पिंपळ, पिंपरी, सुपारी, उंबर, अजमोदा, ओवा, शिंगाडे, साखवेल ही **फलासवे** होत. **मूळांची ११ आसवे**–सालवण, आसकंद, शेवगा, शतावरी, काळे तेड, पांढरे तेड, दांती, लहान दांती, बेल, एरंड, चित्रक.

**नाराचीं ( गाभा ) २० आसवे**– साग, मोठा कळंब, एक साग, चंदन, तिवस, खैर, पांढरा खैर,

सातवीण, अर्जुन सादडा, असाणा, शेण्याखैर, टेंभुरणी, आघाडा, शमी, बोर, शिसव, शिरस, जलवेतस, धामणी, मोह.

**फुलांची १० आसवे**—आरक्त आठ पाकळ्यांचे कमळ, निळे कमळ, पांढरे आठ पाकळ्यांचे कमळ, कमळाचा आणखी एक प्रकार. अनेक पानांचे पांढरे कमळ व तांबुस कमळ, मोह, गव्हला, धायटी.

**कांडासव चार**—कासतृण, ऊस, तालीमखाना व पौंड्रक जातीचा ऊस. **पत्रासव दोन**—पडवळ(कडु) व वरधारा पाने.

**सालीची आसवे चार**—दोन्ही रोध्र, एलवालुक नांवाचे सुगंधी द्रव्य, सुपारी. व साखरेचे आसव एक अशी एकूण चौऱ्यायशी आसवे.

**आसवाम्ल**—न., अम्लद्रव्य० **द्विक्षारसैन्धवादिकानां काञ्जिके मिश्रणं कृत्वाऽम्लत्वं यावद् भूमौ स्थापयित्वा जायमानः पारदस्य दीपनोपयोगी कल्पः** ( र. ११.५० )
एक सिद्ध अम्लद्रव्यप्रकार. कांजीमध्ये दोन क्षार सैंधव इत्यादी द्रव्यांचे मिश्रण करून आंबट होई तो जमिनीत ठेवून तयार झालेला कल्प. हा पाऱ्याची धातु खाण्याची भूक वाढविणारा आहे.

**आसादित**—वि., **साधितम्** ( सुचि. २८.२३ )
सांधलेला. मिळविलेला. संपादिलेला. ठेवलेला.

**आसिक्तक्षीरिक**—वि., **अध्यायपादसंज्ञा० चरकसंहितायां चिकित्सास्थाने वाजीकरणाध्यायस्य द्वितीयपादस्य नाम** ( चचि. २ (२) १ )
चरकसंहितेच्या चिकित्सास्थानातील वाजीकरण अध्यायाच्या दुसऱ्या पादाचे नाव.

**आसीन**—पु., वनस्पति० **तिन्दुकादिकफपित्तजिद्गणे एकं द्रव्यम्, तस्य फलगुणाः कषायमधुरं रूक्षं शीतलं गुरु लेखनं विबन्धाध्मानजननं स्तम्भनं वातकोपनम्।** ( असंसू. ७.१८१–१८४ )
एक वनस्पती० टेंभुरणीच्या गणातील एक द्रव्य. हा गण कफपित्त जिंकणारा आहे. फळ–तुरट, गोड, रूक्ष, थंड, जड, दोष खरडून काढणारे, अवरोध, पोटफुगी करणारे, स्तंभक व वातकोपक.

**आसीनप्रचलायित**—न., स्थिति० **प्रचल इव आचरति आसीनस्य नाम उपविष्टस्य प्रचलायितं नाम अवघूर्णितम्; न तु प्रस्वपनं सर्वसार्विकया, गुणाः—आसीनप्रचलायितं तु अरूक्षमनभिष्यन्दि च भवति। उक्तं च खारणादिना–' इन्द्रियातिश्रमाद्रूक्षो वातलो जागरो निशि, तदालस्याद्दिवास्वप्नः स्निग्धः पित्तकफोल्बणः आसीनप्रचलः स्वप्नो निरभिष्यन्दिबृंहणः ' इति** ( अहृसू. ७.५६ )
बसून झोप घेणे, बसून डुलक्या घेणे, आडवे होऊन झोप घेणे. गुण–थोडे रूक्ष, आर्द्रता न वाढविणारे. रात्रीचे जागरण इंद्रियांच्या अतिश्रमाने रूक्ष, वातुळ; आळसामुळे दिवसा घेतलेली झोप स्निग्ध कफपित्तवर्धक आणि बसून डुलक्या घेणे. हे ओलावा न वाढविता पौष्टिक.

**आसुत**—न., **शुक्तसन्धितं कन्दादिकम्, चिरकालावस्थानादम्लीभूतं कन्दादियुक्तं शुक्तम्, आसुतमुच्यते** ( चसू. २७.२८४; अहृसू. ५.७८ )
कंदमुळे, पाणी व गूळ घालून भांड्यात ठेवावे व ते भांडे धान्य राशीत ठेवून आंबट झाल्यानंतर तयार झालेले पेय.

**आसुर**—वि., **असुरस्येदम्।** ( सुशा. ४.८९ )
असुराचे जे ते आसुर, असुरासंबंधी; असुराच्या स्वभावाचा.

**आसुरी**—स्त्री., वनस्पति० **राजिका** ( र. ३०.६३ ) राई.
न., लवण० **बिडम्** ( ध. २.२८ )
बिडलवण, एक प्रकारचे मीठ,
वि., **राजसकायविशेषः**
**लक्षणम्—ऐश्वर्यवान् रौद्रः शूरस्तीव्रकोपः परगुणे मत्सरी एकाशी निर्दयः आत्मपूजको बह्वाशी च।** ( चशा. ४.४५ ) ( सुशा. ४.८८ )
रजोगुणी शरिराचा एक प्रकार. ऐश्वर्यवान, भयंकर, शूर, महारागीट, दुसऱ्याच्या सद्गुणांचा मत्सर करणारा, एकटाच खाणारा, निर्दय, स्वतःची प्रौढी मिरविणारा, आणि खादाड.

**–सत्व**–वि., राजसकाय०
**आसुरकायः।** ( सुशा. ४.८८ )
दैत्यांच्या स्वभावाचा मनुष्य.

**आसूरी**—स्त्री., वनस्पति० **राजिका** ( र. ३०–६३; असंसू. ७ )
**शाक० राजिका मण्डका वा फञ्जीचिल्ल्यादिगणे।** ( चसू. २७.१०१ )
एक भाजी. मोहरीची भाजी; फंजी चिल्ली इत्यादि गणामधील एक वनस्पति.

**आसेक्य**—पु., **षण्ढविशेषः** ( सुशा. २.४४ )
षंढ, नपुंसक, सवीर्य–असून नपुंसक.

पित्रोर्बीजस्यात्यल्पबलत्वादासेक्यो भवति । सरेतस्कोऽयं षण्ढः । सोऽन्यपुरुषान्निजमुखे व्यवायं कारयित्वा ततः सिक्तं शुक्रं प्राश्य ध्वजोच्छ्रायं लभते । अतो 'मुखयोनिः' इति व्यपदिष्टः ।
(सुशा. २.३८)

चरके 'वक्री' नाम्नाऽस्य निर्देशः
(चशा. २.२०)

अष्टांगसंग्रहे मातुः पितुर्वाऽत्यल्पबलबीजत्वादासेक्योत्पत्तिर्निर्दिष्टा; न तु मातापित्रोरत्यल्पबीजत्वात् । द्वयोर्बीजदोषाद् वक्रध्वजस्योत्पत्तिः कथिता । (असंशा. २)

माता पित्याचे बीज अतिशय अल्प बळाचे असल्याने आसेक्य नावाचा षंढ होतो. याला रेत असते. तो दुसऱ्या पुरुषाला आपल्या तोंडात मैथुन करावयास सांगून तोंडात पडलेले शुक्र पिऊन नंतर त्याला चेतना येते व त्याचे शिश्न ताठ होते; याला मुखयोनि असेहि म्हणतात. चरकांत 'वक्री' **वाकडा** म्हणतात. अष्टांगसंग्रहात आई किंवा बाप यांच्या बीजाच्या अतिशय अशक्ततेमुळे हा होतो. असे म्हटले आहे. दोघांचे बीज जर दोषयुक्त असले तर वाकड्या इंद्रियाचा होतो. तो आसेक्य किंवा वक्री षंढ होय.

**आसोट**—पु., **वृक्ष० वनस्पति० अक्षोटः**
(चवि. ११.३७) आक्रोड.

**आस्तरण**—न., **शयनादिषु यद् अजिनकम्बलादिकं भूमौ आस्तीर्यते तत्** (असंसू. ८.४३)
गादी, आंथरूण इत्यादिकांवर चादर, कांबळा इत्यादि आंथरतात ते. कांबळा, मृगचर्म, चटई, सतरंजी, गालिचा आंथरणे; आस्तर, आवरण, पलंगपोस.

**आस्तिक**—वि., **दत्तमस्ति हुतमस्ति परलोकोऽस्तीत्येवं मतिर्यस्य सः** (सुसू. ३४.२२)
मानवी जीवनात दान, हवन, परलोक ह्या कल्पनांना प्राधान्याने स्थान आहे असे मानणारा.

**आस्तिक्य**—न., **सात्विकगुणः, अस्ति धर्ममोक्षपरलोकादिकमिति मतिरस्येति आस्तिकः**
एक सात्विक गुण—धर्म, मोक्ष; परलोक, इत्यादींना मानवी जीवनात स्थान आहे अशी बुद्धि असलेला.

**आस्थापन**—न., उपक्रम० **निरूहबस्तिः** । (चसू. १.८४)
वयःस्थापनाद्दोषस्थापनाद्वाऽऽस्थापनमित्युच्यते ।
(असंसू. २८.६)

एक उपचार. समप्रकृति व धातुसारत्व दृष्टीने योग्य वय दिसत नसल्यास ते निर्माण करणे, स्थापन करणे—विषम-वृद्ध किंवा क्षीण दोष समत्वाला आणणे, दोषांचे समत्व स्थापन करणे हे कार्य करणारा बस्ति उपचार तो आस्थापन.

**आस्थापनद्रव्यप्रमाणं तु प्रथमे वर्षे प्रकुञ्चस्ततः परं प्रतिवर्षं प्रकुञ्चमभिवर्धयेदाषट् प्रसृतेभ्यः । ततश्चोर्ध्वं प्रसृताभिवृद्धिरष्टादशवर्षस्य तु द्वादशप्रसृता । इदं मानं सप्तति वर्षाणि यावत् । परं चातो दशैव । अन्ये पुनर्द्वादशप्रसृतार्हस्यापि अष्टाविच्छन्ति ।** (असंसू. २८.२२)
द्रव्यांचे प्रमाण—पहिल्या वर्षी ४ तोळे नंतर प्रत्येक वर्षी ४–४ तोळे वाढवून ४८ तोळ्यापर्यंत वाढवावे. नंतर ८–८ तोळे वाढवावे अठराव्या वर्षापर्यंत ९६ तोळ्या इतके हे प्रमाण सत्तर वर्षापर्यंत. यानंतर ऐंशीच तोळे. अन्य मत ६४ तोळे आहे.
**आस्थापनं भुक्तवते न देयम् ।**
(सुचि. ३८.१९.२०)

आस्थापन बस्ति जेवण झाल्यावर देऊ नये.

**—स्कन्ध**—पु., **आस्थापनोपयुक्ता द्रव्यगणाः—ते च षट्—मधुराम्ललवणकटुकतिक्तकषायभेदात्**
(चवि. ८.१३७)

आस्थापनाला उपयुक्त द्रव्यांचा समूह. ते सहा रसांचे सहा गण.

**आस्थापनोपग**—वि., **आस्थापनक्रियायां सहायत्वेन अपायक्षपणपूर्वकं गुणवर्धनपूर्वकं च उपगच्छतीति, सप्तमहाकषायवर्गे एको गणः, त्रिवृद्बिल्वपिप्पलीकुष्ठसर्षपवचावत्सकफलशतपुष्पामधुकमदनफलानीति दशेमान्यास्थापनोपगानि भवन्ति ।**
(चसू. ४.१३)

आस्थापनाला सहाय्यक म्हणजे अपाय न होऊ देता गुणवर्धन पूर्वक मदत करण्याच्या दृष्टीने मुख्य द्रव्यांना सहाय्यक असतात ते. सप्तमहाकषाय वर्गातील एक गण. निशोत्तर, बेल, पिंपळी, कोष्ट, मोहरी, वेखंड, इंद्रजव इत्यादी.

**आस्थाप्य**—वि., **आस्थापनयोग्यो व्याधिः रोगी वा; विशेषतस्तु सर्वाङ्गैकाङ्गकुक्षिरोगवातवर्चोमूत्रशुक्रसङ्गबलवर्णमांसरेतक्षयदोषाध्मानाङ्गसुप्तिक्रिमिकोष्ठोदावर्तशुद्धातिसारपर्वभेदाऽभितापप्लीहगुल्मशूलहृद्रोगभगन्दरोन्मादज्वरब्रध्नशिरःकर्णशूलहृदयपार्श्वपृष्ठकटीग्रहवेपनाक्षेपकगौरवातिलाघवरजःक्षयार्तविष-**

**मान्निस्फिक्जानुजङ्घोरुगुल्फपार्ष्णिप्रपदयोनिबाह्व-ङ्गुलिस्तनान्तदन्तनखपर्वास्थिशूलशोषस्तम्भाऽऽन्त्र-कूजपरिकर्तिकाऽल्पाल्पसशब्दोग्रगन्धोत्थानादयो वा-तव्याधयो । विशेषेण महारोगाध्यायोक्तांश्चैतेष्वा-स्थापनं प्रधानतममित्युक्तम् ।**
( चसि. २. १६ )

आस्थापन देण्यास योग्य रोगी किंवा रोग.
सर्वांग रोग, एकांग (पक्षाघात) रोग, कुशीतले रोग. वात, मूत्र, मळ, शुक्र यांचा अवरोध, बल, वर्ण, मांस, व शुक्रक्षीण, पोटफुगी, स्पर्शनाश, कृमि, वात वर चढणे, पक्व अतिसार, पेरी दुखणे, अवयव दाह, प्लीहा, गुल्मशूल, हृद्रोग, भगंदर, उन्माद, ज्वर, वृषणवृद्धि शिर व कर्णशूळ, हृदय फासळ्या पाठ कंबर जखडणे, कंप, झटका येणे, जडपणा, अतिशय हलकेपण, रजःक्षय, विषम अग्नि, कुल्ले, गुडघे जांघ, मांडी, घोटे, टाच, तळपाय योनि, बाहु, अंगुली, स्तनाग्र, दांत, नख, पेरी, हाडें यात शूल ही सुकणे व ताठरणे, आंतड्यात आवाज कातरल्या सारखी वेदना, थोडा थोडा सशब्द उग्रवासाचा मळ होणे इत्यादी वातरोग. विशेषतः महा-रोगाध्यायातील रोगात आस्थापन प्रामुख्याने द्यावे.

**आस्फालन**–न., **ताडनम्, उल्लालम् ।**
( र. २. १६४ अहृसू. ५.९ )
हलवणे, आदळणे, आपटणे, फेकणे, थापटणे, थोपटणे, ताडन करणे. आघात, थाप, ताडन.

**आस्फोट**–पु., **अर्कः** ( रा. १०.२५ ) रुई, मांदार.

**आस्फोटक**–पु., **आफोटः** ( रा. १०.२५ )
रुई, मांदार.

**आस्फोटन**–न., **कम्पः, प्रहरणम् ।** ( सुउ. ६२.८ )
कंप, प्रहार करणे, तडाखा, जोराचा दणका, सण-णीत ठोका, चपराक, दंड थोपटणे.

**आस्फोटा ( ता )**–स्त्री., **वनस्पति० सारिवा ।**
( सुउ. ३९.२५७ ) सारिवा, उपळसरी, अनंतमूळ.
**अर्कः** ( सुउ.३९.२५७ ) रुई, मंदार.
**विष्णुक्रान्ता**–( र. २९.७९ ) विष्णुक्रांता.
**अमरमल्लिका ।** ( चचि. २३.२४३ ) चमेली.
**गिरिकर्णिका ।** ( र. २५.७ ) गोकर्णी.
**मुकुन्दा ।** ( असंउ. ६ ) मुकुंदा.
**अस्फुरमल्लिका ।** ( चचि. १५.१२५ )
क प्रकारचा मोगरा.
न., **वनस्पति० अर्कः रक्तार्कः**
१ ) रुई, तांबडी रुई.

**सारिवा** ( सुउ. ११.११ )
सारिवा, उपळसरी, अनंतमूळ
**रक्तार्कः** ( च. चि. ७.११२ ) तांबडी रुई.

**( आस्फोता )**–स्त्री., आस्फोटा ( सुसू. ११.११ )
पहा 'आस्फोटा'

**–पल्लव**–पु., न., **अर्कस्य पल्लवः कल्कादिभिर्व्रणशोध-नायोपयुज्यते ।** ( असंउ. ३५ ) रुईचे पान.
पाने वाटून इतर प्रकारे व्रणशोधनात उपयोग.

**–मूलसिद्धघृत**–न., **योग० अर्कमूलसिद्धं घृतम् । अस्य पानं मूषिक-विषापहं भवति ।** ( सु. क.७.४८ )
रुईच्या मुळाने सिद्ध असे घृत. उंदराचे विषनाशक.

**आस्य**–न., **शारीर० मुखम् ।** ( चवि. ८.११७ )
**मुखकुहरम् ।** ( सुउ. ४१.२० )
**प्रमाणतः पञ्चाङ्गुलमास्यम्** ( चवि. ८.११७ )
शरीराचा अवयव, तोंडाची पोकळी. प्रमाण ५ अंगुळे.

**–गन्ध**–पु., **मुखगन्धः ।** ( चसू. ५.२९ )
तोंडाचा दुर्गंध. तोंडाची घाण

**–दाह**–पु., **रोगलक्षणं मुखदाहः** ( चसि. २.१३ )
रोगाचे लक्षण. तोंडाची आग. तोंड येणे. तिखट सहन न होणे.

**–पाक**–पु., **रोग लक्षण० मुख-पाकः** ( अहृसू. २.४ )
तोंड येणे, तोंडात छाले पडणे, तोंड उकलणे. व्रण होणे. तोंडाला तिखट न लागूं देणे.

**–पूति**–स्त्री., **रोगलक्षण० मुखदुर्गन्धः ।**
( असंसू. ३.३१ )
तोंडाला दुर्गंध–घाण. रोगाचे लक्षण.

**–प्रसेक**–पु., **रोगलक्षण० मुखस्रावः** ( असंसू.३.३१ )
रोगाचे लक्षण; तोंडाला पाणी सुटणे. गुळण्या येणे.

**–बाष्प**–न., **मुखफूत्कारजनितोष्मा; ईषदभ्याहतं नयनमास्यबाष्पसंस्वेदितं चेत् क्षणेन तन्नीरुजं भवति ।** ( सुउ. १९.५ )
तोंडाने घातलेल्या फुंकरेची उष्ण वाफ; डोळ्यात खूप असेल तर फुंकर घालून मिळालेल्या उष्णतेने ती खूप–वेदना चटकन कमी होते.

**–मल**–पु., **मुखस्थो मलः ।** ( असंसू. ३.३१ )
तोंडातला मळ, चिकटा; जिभेचा मळ

**–रोग**–पु., **मुखरोगः** ( चचि. २.२२ )
तोंडाचा रोग.

**–लेप**–पु., **उपक्रम० मुखलेपः ।** ( सुउ. १९.३ )
तोंडावर लावण्याचा लेप.

**--विपाक**--पु., रोग०मुखदाहः चत्वारिंशत् पित्तविकारेष्वेकः ( चसू. २०.१४ )
तोंड येणे, तोंडाची आग, तोंडात छाले पडणे, व्रण होणे. ४० पित्तविकारांपैकी एक.

**–वैरस्य**–न., **रोगलक्षण० उचिताद् आस्यरसाद् अन्यथात्वम्**। ( चसू. २८.९ )
तोंडाचा स्वाभाविक रस बदलून निराळा रस होणे, तोंड विरस होणे. पदार्थांचा रस न लागणे, अन्न मातीसारखे विरस–नीरस लागणे.

**–शोफ**–पु., **रोगलक्षण० मुखशोफः अर्शरोगे रिष्टलक्षणमेकम्** ( असंशा. ११.१२ )
तोंडावरची सूज. एक रोगलक्षण.

**--शोष**--पु., **रोगलक्षण० मुखशोषः** ( अहसू. ६.१३२ )
तोंड सुकणे, तोंडाला कोरड पडणे.

**–संस्रवण**–न., **रोगलक्षण० मुखे लालास्रावः** ( चनि. ७.६, चशा. ४.१६ )
तोंडाला पाणी सुटणे, लाळ सुटणे, गुळण्या येणे.

**–स्रवण**–न., **रोगलक्षण० आस्यलालास्रावः**
तोंडाला पाणी येणे, लाळ सुटणे.

**आस्या**–स्त्री., **आसनम्, स्थितिः, सुखोपविष्टस्य स्थितिः।** ( सुचि., २४.७८ )
बसणे, बैठक, स्वस्थ बसणे. सुखासीनत्व.
**तद्गुणाः–वर्णकरी, कफकरी, स्थौल्यकरी, सौकुमार्यकरी सुखदा च** ( सुचि. २४.७९ )
गुण–वर्ण चांगला करणारे, कफ, स्थूलता व सुकुमारत्व करणारे व सुखदायक.

**–सुख**–न., **उपविष्टस्य चेष्टोपरमः तेन कृतं सुखम्** ( चचि. ६.४ )
सुखासीनाचे सुख; बसून राहाण्यातील सुख; निश्चिंत बसण्याचे सुख.

**आस्योपदेह**–पु., **रोगलक्षण० मुखे मलोपलेपः** ( चचि. १५,६८ )
एक रोग लक्षण. तोंडात मळाचा लपेटा, तोंडाचा चिकटा.

**आस्योपलेप**–पु., **रोगलक्षण० मुखलिप्तता।** ( अहसू. १६.२३ )
तोंडाचा लपेटा, तोंडाचा चिकटा, जिभेचा लेप; चिकटा.

**आस्राव**–पु., **स्रवणम्।** ( चसू. ५.२८ )
**नासारोग० अत्र जलोपमः श्लेष्माऽजस्रं नासापुटात्स्रवति।** ( र. २४.२० )
नाकाची गळ, कफाचा पाण्यासारखा स्राव नाकातून एक सारखा गळतो. नाकाचा एक रोग.

**आस्वादन**–न., **रसग्रहणम्।** ( सुचि. २९.१० )
रसाचा आस्वाद घेणे. चाखणे. रसाची चव. रुचि. गोडी घेणे.

**आहत**–न., **आहननम् आघातः " नपुंसके भावे क्तः "** ( चसू. १३.९६) ( सुसू. २९.४५ )
आघात झालेला, मार खाल्लेला, आघात, मार.
**रोगकारण० आघात।** ( चसू. १३.१६ )
आगंतु रोगाचे एक कारण; मार, ठोका, दणका.

**आहरण**–न., **यन्त्रकर्म० उपक्रम० आनयनम् निर्हरणं वा शल्यस्य।** ( सुसू. ७.१७, सुचि. १.८ )
यंत्राचे एक कर्म. एक उपचार, शल्य बाहेर आणणे किंवा काढणे, बाहेर ओढणे.

**–हेतु**–पु., **( शल्यस्य ) आहरणोपायः, महतामणूनां वा सर्वशल्यानां द्वावेवाऽऽहरणहेतू भवतः—प्रतिलोमोऽनुलोमश्च** ( सुसू. २७.६ )
शरिरातील शल्य बाहेर काढण्याच्या उपायांचे दोन प्रकार आहेत. ज्या मार्गाने–दिशेने शल्य आत गेले त्याच्या उलट मार्गाने–दिशेने शल्य बाहेर काढणे हा प्रतिलोम हेतु व ते शल्य त्याच दिशेने पुढे ढकलून काढणे हा अनुलोम हेतु होय.

**आहरणोपाय**–पु., **आकर्षणोपायः** ( अहसू. २८.१९ )
काढण्याचा, ओढण्याचा उपाय.

**आहव**–पु., **संग्राम** ( सुसू. २.१० )
युद्ध, संघर्ष, लढाई, संग्राम.

**आहार**–पु., **आह्रियते इति आहारः, अन्नपानादि सर्वम्, स च प्राणिनां प्राणहेतुर्मूलं पुनर्बलवर्णौजसां च।**
खाल्ला जातो तो आहार. अन्नपान इत्यादि सर्व. सर्व प्राण्यांच्या प्राणाच्या अस्तित्वाचे कारण. बल, वर्ण, ओज, यांचे मूळ.
**ब्रह्मादेरपि लोकस्य स्थित्युत्पत्तिविनाशहेतुः आहारः, आहारादेवाऽभिवृद्धिर्बलमारोग्यं वर्णेन्द्रियप्रसादश्च, तथा ह्याहारवैषम्यादस्वास्थ्यम्।** ( सुसू. ४६.३ )
**संक्षेपेण सर्वमन्ने प्रतिष्ठितम्** ( चसू. २७.३५० )
**स्वरूपम्–पञ्चमहाभूतात्मके देहे आहारोऽपि पाञ्चभौतिकः, सम्यग् विपक्वो भूत्वा स्वान् गुणानभिवर्धयति। स पुनः षड्रसात्मकः–मधुराम्ललवणकटुतिक्तकषायभेदेन गुणतः पुनर्गुरुलघुभेदेन द्विधा।** ( सुसू. ४६.५२५ )

आहारगुणाः--आहारसम्पत्--बलवृद्धिकर--भावेष्वाहारः प्रीणनः सद्यो बलकृद्देहधारकस्तृप्तिकरः, उष्णं, स्निग्धं मात्रावद्वीर्याऽविरुद्धमित्याहारसाद्गुण्यम्; आहारकर्माणि--सद्यः प्रीणनो, बलकृद्देहधारकः, आयुष्करो, भ्राजिष्णुत्वकृत् समुत्साहकरः, स्मृतिकर ओजस्करोऽग्निवर्धनश्च ।

( सुचि. २४.६८ )

आहारप्रकाराः--चतुर्विधमन्नम्--पेय--लेह्य--भोज्य--भक्ष्यभेदात् । ( सुसू. ४६.४९४ )

षड्विधम्--चूष्य--पेय--लेह्य--भक्ष्य--भोज्य--चर्व्य--भेदात्-- ( भापू. ४ )

अष्टविधं पुनरन्नमिति केचित् । भोज्य--पेय--चोष्य--लेह्य--खाद्य--चर्व्य--निष्पेय--भक्ष्यभेदात्

( ध. ७.८६ )

स्वभावभेदेन आहारो द्विविधः गुरुर्लघुश्च; दिव्योदकरक्तशालिषष्टिकमुद्गैणलावादयो लघवः, क्षीरेक्षुव्रीहिमाषानूपामिषादयो गुरवः ।

( असंसू. १०.५ )

तत्र सप्त आहारकल्पनाः--स्वभाव--संयोग--संस्कार--मात्रा--देश--कालोपयोग--व्यवस्थाभेदेन स्वास्थ्यास्वास्थ्यफलानां हेतुभूताः । ( असंसू. १०.४ )

आहारकालः--स्वस्थानस्थेषु दोषेषु स्रोतःसु विमलेषु च । जातायां च--प्रकाङ्क्षायामन्नकालं विदुर्बुधाः ॥ ( काखिल० ५.१० )

विसृष्टे, विण्मूत्रे, विशदेन्द्रिये, गुरुत्वरहिते देहे, मधुराम्लधूमगन्धिवियुक्ते उद्गारे, निराकुले हृदयेऽधः प्रवहति वाते, भक्ताकाङ्क्षायामनायासश्रमरहिते, बुभुक्षोदयात्स्तब्धतारहिते कुक्षावाहारो दातव्यः । ( सुउ. ६४.८४ )

आहारमात्रा--आहारस्य सम्यग् युक्तं प्रमाणं पुनरग्निबलापेक्षि, दुर्बलाग्निविवृद्धये एककालं तथा हीनमात्र एव आहारो दातव्यः । (सुउ. २. ६४.६५) यावान् आहार एककालं भुज्यते पुरुषेण, स आहारराशिः ( असंसू. १०.९ ) तस्य प्रमाणं तु जठरस्य द्वौ भागावन्नेन प्रपूरयेत् जलादिना पानेनैकमंशं प्रपूरयेच्चतुर्थं तु पवनादीनामाश्रयमवशेषयेत् ।

( अहसू. ८.४६ )

आहारगतिः परिणामश्च--स खलु विधिवत् अभ्यवहृतमन्नजातं प्राणेन वायुना कोष्ठमाकृष्टं द्रवैर्विभिन्नसंघातं स्नेहेन मृदूकृतमामाशयस्थं समानेन अभिसंधुक्षितोऽन्तरग्निः पचति यथा बाह्याग्निः स्थालीस्थतोयतण्डुलं पचति ( असंशा. ६.५७ )

आहारपरिणामकरा भावाः--पुनरूष्मा वायुः, क्लेदः, स्नेहः, कालः, समयोगश्च इति । तत्रोष्मा पाचयति, वायुरपकर्षति, क्लेदः शैथिल्यमापादयति, स्नेहो मार्दवं जनयति, कालः सर्वपर्याप्तिमभिनिर्वर्तयति । समयोगस्त्वेषां परिणामधातुसाम्यकरः संपद्यते । ( असंसू. १०.६१ )

( कोष्ठात् हृदयं प्राप्तः ) आहाररसो व्यानविक्षिप्तो यथास्वं सप्तसु धात्वग्निषु क्रमात् पच्यमानः स्वात्मभावप्रच्युतिसमनन्तरमेव प्राप्तरक्तादिधातुसंज्ञकः कालवदस्खलितबलप्रमाणो देहमूर्जयित्वा धातून् धातुमलांश्च पुष्णाति । ( असंशा. ६.६४ )

आहारविधिः--उष्णं स्निग्धं मात्रावत् जीर्णे वीर्याविरुद्धमिष्टे देशे, इष्टसर्वोपकरणं नातिद्रुतं, नातिविलम्बितमजल्पन्, अहसन् तन्मना भुञ्जीत । आत्मानं च सम्यगभिसमीक्ष्य भुञ्जीत । अयं विधिः अरोगाणामातुराणां च हिततमो भवति ।

( चवि. १.२४ )

आहारविधिविशेषाऽऽयतनानि अष्टौ । प्रकृति--करण--संयोग--राशि--देशकालोपयोगसंस्थोपयोक्तार--इत्यष्टौ । ( चवि. १.२१ )

बुभुक्षितेन पुरुषेण वातपित्तप्रशमनाय प्रथमं मधुरो रसः ग्राह्यः सः पक्वाशयगतं वायुं जयति । अम्ललवणौ मध्यभोजनस्थौ पित्ताशयेऽग्निदीप्तिं कुरुतः अन्ते कफजयाय कट्वादयः । मतांतरं स्वादौ फलानि भुञ्जीत दाडिमादीनि, ततः पेयान् ततो भोज्यान् भक्ष्यांश्च अत्रापि घनं पूर्वं समश्नीयादिति केचिदाहुः । ( सुसू. ४६.४६० तः ४६३ ड )

बालानां पुष्टिवर्धकमन्नं--शालिषष्टिकानां विशेषतः पुराणानां निस्तुषैः क्षालितैर्भृष्टैस्तण्डुलैः साधिताः सस्नेहलवणाः द्रवाः लेह्याः, तथा च गोधूमानां यवानां वा चूर्णं यथासात्म्यं देशाग्निबलकालं क्षुधां चाऽभिसमीक्ष्य बालकमाशयेत् ।

( काखिल. १२.१९--२०.२३ )

ब्रह्मादि देव व जीववर्ग यांची उत्पत्ती स्थिति नाश यांचे कारण आहार आहे; आहारापासूनच शरीर मन यांची वाढ, बळ, आरोग्य, वर्ण, इंद्रियांची प्रसन्नता होते. आहाराच्या वैषम्यापासून विकार होतात. सारांश सर्व अन्नावर अवलंबून आहे.

स्वरूप—या पंचमहाभूतात्मक शरिरांत पंचमहाभूतात्मक आहारच चांगला पचून आपले गुण वाढवितो. तो सहा रसांचा—गोड आंबट खारट तिखट कडु तुरट या रसांचा आहार. पुनः जड व हलका असा दोन प्रकारचा. **गुणवान आहार**—बल वाढविणारा, आवडणारा, ताबडतोब शक्तिदायक, शरीरधारक, तृप्तिकर, उष्ण, स्निग्ध, परिमित, वीर्याने विरुद्ध नसलेला असा असावा. **आहाराची कर्मे**—वरील कर्मे व शिवाय आयुष्यकर तेज उत्साह स्मृति ओज करणारा व अग्नि वाढविणारा असतो. **प्रकार** चार; **पेय**—पिण्यास योग्य द्रवपदार्थ, **लेह**—श्रीखंडासारखे चाटावयाचे; **भोज्य**—मऊ भात वगैरे विशेष न चावता खाण्यासारखे व **भक्ष्य**—लाडू भाकरी ऊस इ. कडक चावून खाण्यासारखे.

६ **प्रकार—चूष्य** म्हणजे चोखून खाण्यासारखे आंबा वगैरे. **चर्व्य** म्हणजे दातानी चावून खाण्या सारखे हे आणखी २.

८ **प्रकार—निष्पेष्य** म्हणजे कुटून किंवा वाटून खाण्यासारख्या कोरड्या ओल्या चटण्या वगैरे; आणि **खाद्य** म्हणजे खडिसाखर, फुटाणे यासारखे असे आणखी २ मिळून ८ प्रकार होतात.

अन्नाचे स्वभावतः दोन प्रकार; जड व हलके. पावसाचे पाणी, तांबडी साळ, साठे तांदूळ, मूग, काळाहरीण, व लावा यांचे मांस हे हलके. दूध, ऊस, व्रीही जातीचा तांदूळ, उडीद, झाडी व पाणी पुष्कळ असलेल्या प्रदेशातील मांस हे जड अन्न. या सात कल्पनांनी अन्न रोगकर किंवा आरोग्यदायक होते. १ **स्वभाव**—मेंढीचे मांस स्वभावतःच अनारोग्यकर, २ **संयोग**—साठे तांदूळ हलके पण डाळीशी संयोग करून खिचडी केली की ते जड होतात. ३ **संस्कार**—तांदूळ अग्निसंस्काराने लाह्या केल्या तर हलका, पोहे केले तर जड. ४ **मात्रा**—अति मात्रेने विकारकर. ५ **देश**—पुष्कळ पाणी व झाडीच्या प्रदेशातील प्राण्याचे मांस जड व त्या प्रदेशात कफकर अन्न खाल्ले तर विकार करणारे होते. रूक्षप्रदेशातले अन्न व मांस याच्या उलट गुणांचे असते. ६ **कालोपयोग—हेमंतात** उष्ण, स्निग्ध, जड अन्न उपयुक्त तर **ग्रीष्मात** स्निग्ध, द्रव, शीत उपयुक्त. ७ **व्यवस्था**—प्रथम मधुर पदार्थ खाणे नंतर खारट आंबट व नंतर कडु तिखट पदार्थ खाणे हितकर. याच्या उलट अहितकर.

**आहाराचा काळ**—शौचाला व लघ्वीला साफ झाले आहे, दोष आपल्या स्थानात आहेत, स्रोतसे व इंद्रिये स्वच्छ आहेत, शरीर हलके आहे, गोड आंबट धुरकट नसलेले म्हणजे शुद्ध ढेकर येत आहेत, अपानवायु व्यवस्थित सरतो, हृदय निर्दोष आहे, थकवा नाही, पोट हलके असून खाण्याची इच्छा व भूक लागली की अन्न घ्यावे. **आहाराचे प्रमाण**—अग्नीच्या पचनशक्तीप्रमाणे; अग्नि दुर्बळ असेल तर एक वेळच जेवावे किंवा कमी जेवावे. एक वेळच्या जेवणात चांगले पचेल असे जितके अन्न घेऊ शकेल ते प्रमाण. ती राशी. जठराचे दोन भाग अन्नाने व एक भाग पाण्याने पूर्ण भरून एक भाग वायू इत्यादींच्या संचाराकरिता रिकामा ठेवावा.

**आहाराची गति व पचन**—विधियुक्त घेतलेले अन्न प्राण वायूकडून जठरात नेले जाते; द्रवाने ते बारीक—सूक्ष्म केले जाते, स्नेहाने मऊ करून, समान वायूकडून प्रदीप्त केलेल्या अंतस्थ अग्नीने थाळीतल्या पाणी व तांदुळाला बाह्य अग्नीने पचवावे तसे ते पचविले जाते. **आहाराचे रूपांतर करणाऱ्या गोष्टी**—उष्णता, वात, ओलावा, (द्रव) स्नेह, काळ, व मितप्रमाणाचे शरिराला गरज असलेलेच अन्न ह्या होत. यातील उष्णता पचवते, वात खाली खाली नेतो, ओलावा अन्न शिथिल करतो, स्नेह ते मऊ करतो, काल ते सर्व शरीरभर नेतो व ह्या सर्व गोष्टी यथायोग्य झाल्याने धातूचे साम्य होते. कोठ्यातून हृदयात गेलेला अन्नरस व्यान वायूकडून शरीरभर फेकला जाऊन यथायोग्य सातही धात्वग्नीने क्रमाने पचत जातो व त्याचे रूपांतर रक्तादि धातूंमध्ये होते. काळाप्रमाणे अखंड पचणारा व शरिराला बल व उत्साह देणारा अन्नरस त्या त्या धातूंना व धातुमळांना पुष्ट करतो. **जेवणाचा विधि**—पूर्वीचे खाल्लेले अन्न जिरल्यानंतर प्रसन्न अशा ठिकाणी आवश्यक सर्व साधनासह शरिराची गरज लक्ष्यात घेऊन योग्य प्रमाणात अति घाई न करता व न रेंगाळता, न बोलता, न हासता, जेवणाकडेच लक्ष्य ठेवून स्वतःच्या रोगी निरोगी शरीरमनाचा विचार करून जेवावे.

उपयुक्त किंवा अनुपयुक्त आहाराच्या विधीची **कारणे**—स्वभाव (जड इ.) संस्कार, संयोग, प्रमाण, देश, काल, नियम व उपयोग करणारा ही आठ होत. **भोजनात रसाचा क्रम**—प्रथम वातपित्तशमना-

करिता गोड रस घ्यावा; तो पक्वाशयातील वायु शमवितो. आंबट खारट हे भोजनामध्ये घेतल्याने पित्ताशयात अग्नि प्रदीप्त करतात, भोजनात शेवटी तिखट कडु व तुरट रस घेऊन कफ जिंकला जातो. एक **दुसरे मत**–प्रथम डाळिंब इत्यादि फळे खावीत; नंतर पेयपदार्थ, नंतर भात इत्यादि व कठिण पदार्थ. यात ही प्रथम कठीण ( भक्ष्य ) घ्यावे असे एक मत आहे. **बालकांचा पौष्टिक आहार**–साठे तांदुळाचा भात विशेषतः तुषरहित धुतलेले जुने तांदूळ भाजून त्याचे स्नेह व मीठ घालून केलेले चाटून खाण्याजोगे स्वरूप तसेच जव किंवा गव्हाचे पीठ, देश, अग्नि, बल, काळ, सात्म्य व भूक पाहून बालकाला द्यावे.

**–परिणामधातु**–पु., **आहारपरिणामभवो धातुः रसाख्यः** । ( चनि. १.२० ) ( चशा. ७.१५ )
आहाराचे पचन झाल्यावर व तो शरीर गुण–भावात परिणत झाल्यावर बनलेला रसधातु.

**–प्रसादाख्य**–वि., **आहारप्रसाद इति आख्या यस्य सः रसः** । ( चमू. २८.४ )
आहार पचल्यानंतर उत्पन्न होणारा आहारसाररूप–प्रसादरूप, आहारप्रसाद या नांवाने संबोधिलेला रस.

**–मल**–पु., **आहारस्य मलः, विण्मूत्रम् इत्यर्थः** ( सुसू. ४६.५२८ )
**वातोऽपि आहारमलः** । ( चसू. २८.४ चक्र )
आहाराचा मल. विष्ठामूत्र इत्यादि, वातही आहाराचा मल होय.

**–रस**–पु., **रस गतौ धातुः अहरहः गच्छति इत्यतो रसः** ( सुसू. १४.१३ )
रस धातूचा अर्थ गती असा आहे. रात्रंदिवस जात असतो, शरिरात फिरत असतो–रहातो तो रस.
**तत्र पाञ्चभौतिकस्य चतुर्विधस्य षड्रसस्य द्विविध-वीर्यस्याष्टविधवीर्यस्य वाऽनेकगुणस्योपयुक्तस्य आहा-रस्य सम्यक् परिणतस्य यस्तेजोभूतः सारः परमसूक्ष्मः स रसः इत्युच्यते, तस्य हृदयं स्थानम्** । ( सुसू. १४.३ )
**तत्र सर्वधातूनाम् अन्नपानरसः प्रीणयिता भवति । "रसजं पुरुषं विद्याद्रसं रक्षेत् प्रयत्नतः । अन्नात्पानाच्च मतिमान् आचाराच्चाप्यतन्द्रितः"** ॥ ( सुसू. १४.१२ )
पृथ्वी इ. पंचमहाभूतात्मक चावण्यासारखे पिण्या-सारखे इ. चार प्रकारचे सहा रसांचे दोन किंवा आठ वीर्यांनी युक्त, अनेक गुणांचे अन्न व्यवस्थित पचल्यावर जो तेजोभूत प्रसाद रूप व साररूप अति-शय सूक्ष्म अंश तो रस म्हटला जातो. त्याचे हृदय हे स्थान होय. अन्नपानाचा पचनानंतर बनलेला रस सर्वधातूंचा परिपोषक आहे. पुरुष रसाचा असतो म्हणून रस विकृत होऊ नये यासाठी अन्नपान व आचारविचाराच्या बाबतीत त्याने जपावे.

**–विधिविधान**–न., **आहारविषये नियमकथनम्** । ( चवि. १.३४ )
आहार कसा घ्यावा याचा जो विधी त्याबद्दल सांगणे. आहार विषयक नियम.

**–शक्ति**–स्त्री., **आहारग्रहणस्य सामर्थ्यम्; रुग्ण-परीक्षणस्यैकं साधनम् आहारशक्तिः अभ्यवहरण-शक्त्या जरणशक्त्या च परीक्ष्यते** ( चवि. ८.१२० )
आहारग्रहण व पचनसामर्थ्य. रोगी आहार किती घेऊ शकतो व पचवू शकतो ते सामर्थ्य जाणून घेणे रोग्याच्या परिक्षेचे एक साधन आहे.

**आहार्य**–पु., **पञ्चदशकर्णबन्धेषु एकः । द्रष्टव्यः कर्णबन्धः** ( सुसू. १६.१० )
कानाच्या पंधरा बंधांपैकी एक. पहा 'कर्णबन्धः'
न., **आहरणीयम्, आकर्षणीयम् शस्त्रकर्म; शस्त्र-कर्मस्वेकम्**
शस्त्रकर्मापैकी एक, शरिरातील शल्यरूप द्रव्य ओढून, खेचून काढणे

**–विषय**–**शर्करास्त्रिस्त्रः, दन्तमलः, अश्मरी, शल्यं, मूढगर्भः, गुदे निचितं वर्चः इति आहार्यविषयाः,** ( सुसू. २५.११–१२ )
मूत्रशर्करा तीन प्रकारची, दातावर साचलेला मळ, मूतखडा, शल्य, गुदमार्गात अडकलेला मळ, मूढगर्भ इत्यादि हे सर्व बाहेर काढावयाचे विषय होत.

**आहित**–वि., **प्रयुक्तम्** ( सुचि. २७.४ )
उपयोगात आणलेले, प्रयोग केलेले.

**आहुल्य**–न., वनस्पति०
**तिक्तम्; शीतम्; चक्षुष्यम्; पित्त–दोषनुत्; मुखरुक्कुष्ठकण्डूतिजन्तु–शूलव्रणापहम्**
**आहुल्यं हुलराख्यं च गरं तखटं तथा । शिम्बी-फलं सुपुष्पं स्यादर्बुरं दन्तकाष्ठकम् । हेमपुष्पं तथा पीतपुष्पं काञ्चनपुष्पकम् । नृपमङ्गल्यकं चैव शरत्पुष्पं त्रिरेकधा** ॥ ( रा. ४.३३–३४ )

एक वनस्पति. सोनतरवड. पिंवळ्या फुलांचे शेंग येणारे छोटे झाड. शरदऋतूत फुले येतात. **गुण**– कटु, शीत, डोळ्याला हितावह, पित्तघ्न, मुखरोग, कुष्ठ, खाज, जंतु, शूळ आणि व्रणनाशक.

**इ**

**इक्षु**–पु., वनस्पति० तृण० तस्य गुणाः—
मधुरः, मधुरविपाकः, गुरुः, शीतः, स्निग्धः, बल्यः, वृष्यः, मूत्रलः, रक्तपित्तप्रशमनः कृमिकफकरश्च
( सुसू. ४५.१४८; ध. ४.१२० )
**बालेक्षुः**–कफकरः मेदकरः मेहकरश्च **तरुणेक्षुः**– स्वादुः, ईषत्तीक्ष्णः, वातहृत्, पित्तनुत्,
**वृद्धेक्षुः**–रक्तपित्तहरः क्षतहृत्, बलवीर्यकृत्
( भाप्र. इक्षुवर्गे; )
**मूत्रजननानां श्रेष्ठः** ( चसू. २५.४० )
**श्रमहरद्रव्येष्वेकम्** ( चसू. ४.१६ )
**शुक्रशोधनद्रव्यम्** ( चसू. ४.१२ )
इक्षुजातयः–पौण्ड्रकः, भीरुकः, वंशकः, श्वेतपोरकः, ( शतपोरकः ) कान्तारः, तापसेक्षुः, काष्ठेक्षुः, ( काण्डेक्षुः ); सूचिपत्रकः, नैपालः, दीर्घपत्रः, नीलपोरः, कोशकृत् इत्येता द्वादश, तासां गुणाः—
**पौण्ड्रकः भीरुकश्च**–सुशीतः, मधुरः, स्निग्धः, बृंहणः, श्लेष्मलः, सरः, अविदाही, गुरुः, वृष्यः।
**वंशकस्तु** आभ्यां तुल्यगुणः किञ्चित्सक्षारश्च।
**श्वेतपोरस्तु** वंशकवत् किञ्चिदुष्णः वातहा च।
तथैव कान्तारतापसौ वंशकानुगतौ।
**काष्ठेक्षुरपि** एवंगुणः परं वातप्रकोपणश्च, सूचिपत्रः, नीलपोरः, नेपालः, दीर्घपत्रकः। एते वातलाः कफपित्तघ्नाः, कषायाः विदाहिनः।
**कोषकारः**–गुरुः शीतो रक्तपित्तक्षयापहः
( सुसू. ४५.१४९ तः १५५ )
**अवयवविशेषेणेक्षोर्माधुर्यम्**–इक्षो रसः अतीव मधुरो मूले, मध्ये मधुरः, अग्रेषु पर्वसंधिषु च इक्षूणां लवणो रसः स एव दन्तनिष्पीडितः, अविदाही, कफकरो, वातपित्तनिवारणो वक्त्रप्रह्लादनो वृष्यश्च।
यात्रिकस्तु गुरुः विदाही विष्टम्भी च
( सुसू. ४५.१५५ तः ५८ )
**इक्षुरसपानं श्रेष्ठं पाण्डुरोगे** ( सुउ. ४४.१८ )
**सर्वोदरेषु च** ( असंचि. १७. )
**रक्तपित्ते च** ( चचि. ४.९; सुसू. ४६.४३१ )
**इक्षुरसपूपकः**–कृतान्नविशेषः इक्षुरसे भाविताः पोलिकाः गुर्व्यस्तर्पणा वृष्याश्च ( चसू. २७.२६९ )



**इक्षुविकृतयः**–इक्षोः जाताः फाणितगुडशर्करादयः
( सुसू. ४५.१५९ )
**इक्षुशुक्तम्**-इक्षुरसजन्यः आसुत–विशेषः स लघुः,
( असंसू. ६.१३६ )

N. O.—GRAMIMEAE
L.—SACCHAHRUM OFFICINARUM
ENG.—SUGAR CANE

हिं.–गन्ना, इख, उंख, गांडा, पौंडा
गु.–शेरडी
म.–ऊस. ऊंस
बं.–इक्षु. आक. कुशिर
ता.–इक्कु
फा.–नेशकर, केशकर.

**ऊस** गुण–गोड, पचल्यावरही गोड, जड, थंड, स्निग्ध, बलकर, शुक्रधातूला हितकर, मूत्रल, रक्तपित्तशामक, कृमि व कफकारक.
**कोवळा ऊस**–कफ, मेद व प्रमेहकारक. **पूर्ण वाढीचा ऊस**–गोड, थोडा तीक्ष्ण वात व पित्तनाशक. **जुनाट ऊस**–रक्तपित्तहारक व जखमनाशक, बलवीर्यकारक.
मूत्रजनक द्रव्यात श्रेष्ठ; श्रमहारक, शुक्रशोधक. उसाच्या जाती १२ सर्व समान गुणांचे पण पौंड्रक व भीरुक हे सारक; वंशक थोडा क्षारयुक्त, श्वेतपोर थोडा उष्ण क्षारयुक्त व वातहारक, वंशकाप्रमाणेच कांतार व तापस; काष्ठेक्षुही तसाच पण वात प्रकोपक, कोषकार जड, थंड, रक्तपित्त, क्षयनाशक. बाकीचे चार तुरट, वातुळ, कफपित्तनाशक, जळजळ करणारे. **अवयवानुरूप गुण**-रस-मुळात अतिगोड, मध्ये गोड, शेवटी व पेऱ्यांच्या सांध्यात खारट, दांताने चावून खाल्ला तर–जळजळ न करणारा, कफकर, वातपित्तनाशक, तोंडाला आनंददायक व शुक्राला हितकर. यंत्राने काढलेला रस–जड, जळजळणारा व अवष्टंभक. पांडुरोगात, सर्व उदरात व रक्तपित्तात उसाचा रस पिणे चांगले. उसाच्या रसात केलेल्या पोळ्या पुऱ्या इत्यादी पचायला जड, धातूंचे पोषण करणाऱ्या, शुक्रवर्धक. **उसाचे पदार्थ** काकवी, गूळ, साखर इत्यादी. उसाचा शिरका हलका.

**–काण्ड**–पु., काशः (ध. ४.१३०) (असंसू. १४.३)
कास गवत, दर्भाचा एक प्रकार, कासाड तृण.

**–कुसुम**–काशः ( ध. ४.१३० ) पहा ' इक्षुकाण्ड '.

**–गन्ध**–पु., **वनस्पति॰ क्षुद्रगोक्षुरः** ( रा. १.१३१ )
लहान गोखरू, सराटा.

**–गन्धा**–स्त्री., **क्षीरविदारी** ( ध., १.१४९ )
क्षीरविदारी, दुधीभुईकोहळा, पांढरा भुईकोहळा.
**कोकिलाक्षः** ( रापरि. ४.४९ ) इक्षुविरक, तालीमखाना.

**–ज**–वि., **शाक॰** ( सुसू. ४६.२९३ )
उसामध्ये उत्पन्न होणारी भाजी.

**–जात**–पु., **गुडः** ( सुचि. ९.४४ )
उसापासून उत्पन्न होणारा गूळ.

**–दर्भा**–स्त्री., **वनस्पति॰, मधुरा, कषाया, रुच्या, सन्तर्पणी, कफपित्तहरा, स्निग्धा; लघुः।**
( रा.परि. ८.४७ ) गोडदर्भ.
**गुण**– मधुर, तुरट, रुचकर, तृप्तिकर, कपपित्तहर, स्निग्ध, लघु,

**–पत्रक**–पु., **जूर्णा** ( रा. १६.१६७ ) जोंधळा.

**–बालिका**–स्त्री., **कोकिलाक्षः** ( असंसू. १५.२२ )
तालीमखाना.

**–बालिकारसमेह**– पु., **श्लेष्मनिमित्तः प्रमेहभेदः: इक्षुमेहः** ( चसू. १९.४( ९ )
इक्षुमेह, एक प्रमेह.

**–मूल**–न., **इक्षोर्मूलम्, महाकषायवर्गे कण्ठ्यगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१० )
**पञ्चतृणमूलेष्वेकम्** ( चचि १.४४ )
उसाचे मूळ, तृणपंचमुळातले एक द्रव्य.
पु., **मोरटः** ( चसू .४.१० ) मोरवेलीचा एक प्रकार.

**–मेह**–पु., **प्रमेहरोग॰ अस्मिन् रोगे रुग्णः इक्षुरस– –मिवातिमधुरं, शीतम् ईषत्पिच्छिलाविलं च मेहति।** ( असंनि. १०.११ )
इक्षुमेह, एक प्रमेह. ह्या रोगात उसाच्या रसाप्रमाणे अतिगोड, थंड, किंचित बुळबुळीत व गढूळ असे लघ्वीला होते.
**चिकित्सा—इक्षुमेहिन वैजयन्तीकषायं पाययेत। वैजयन्ती नाम अग्निमन्थः** ( सुचि. ११.९ )
इक्षुमेहावर वैजयन्तीचा–अरणीचा काढा द्यावा.

**–योनि**–स्त्री., **इक्षुजाति॰ करङ्कशालिः अतीवमधुरः इक्षुरयम्** ( रा. १४.१८५ )
उसाची एक जात. रसाळ व अति गोड ऊस.

**–वर्ग**–पु., **इक्षुगणः, पौण्ड्रकादयः सर्वे इक्षवः** ( अहसू. ५.४२.५४ )
उसाचा गण; सर्व उसांचा समूह.

**–वल्लरी**–स्त्री., **क्षीरविदारी** ( रा. ७.१९६ )
दुधीभुईकोहळा, पांढरा भुईकोहळा.

**–वल्ली**–स्त्री., **क्षीरविदारी** ( ध. १.१४९ )
पांढरा भुईकोहळा.

**–वाटिका**–स्त्री., **इक्षुजातिविशेषः, करङ्कशालिः,** ( रा. १४.१८५ )
उसाचा एक प्रकार; अतिमधुर व रसाळ ऊस.

**–वाटी**–स्त्री., **इक्षुवाटिका** ( रा. १४.१८५ )
अतिमधुर व रसाळ ऊस.

**–वालिका**–स्त्री., **कोकिलाक्षः** तालीमखाना.
**इक्षुवालिका, खागालिका, स्तन्यजननगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१२ )
दुग्धोपादकगणातील एक द्रव्य.
**काश तृणम्** ( चसू. ४.१२ ) काश, दर्भाची जात.

**–वालिकामेह**–पु., **रोग॰ कफजप्रमेहविशेषः, इक्षुरसतुल्यमूत्रत्वादिक्षुमेहः।** इक्षुमेह एक कफज प्रमेह.

**–वालिकारसमेह**–पु., **प्रमेहरोग॰ इक्षुमेहः कफप्रधानः प्रमेहभेदः** ( चनि. ४.१० )
इक्षुमेह. एक कफज मेह.

**–वालु**–स्त्री., **वनस्पति॰ इक्षुवालिका** ( असंक. ४ )
तालीमखाना

**–विकार**–**इक्षुजातं द्रव्यम्; इक्षुविकृतिः गुडफाणित-शर्करादिः प्रमेहरोगे वर्ज्यः** पु., ( सुचि. ११.५ )
उसाचे काकवी, गूळ, साखर इत्यादि विकार.

**–विकृति**–स्त्री., **इक्षुजातं द्रव्यम्, इक्षुविकारः** ( चसू. ५.५ )
उसापासून झालेले गूळ काकवी. साखर इ॰ द्रव्ये.

**–सार**–पु., **गुडः** ( ध. ४.१२८ ) गूळ.

**इक्षुक**–पु., **वनस्पतिः॰ शरभेदः स्थूलशरः** ( सुसू. ३८. ७५ ) ( ध. ४.१३५ )
शर नांवाच्या गवतातला प्रकार. एक वनस्पती.

**इक्षुर**–पु., **इक्षुभेदः, कृष्णेक्षुः** ( रा. १४.१८७ )
काळा ऊस.
**शरः, स्थूलशरः** ( रा. ८.२११; ध. ४.१३५ )
**कोकिलाक्षः** ( रापरि. ४.४९ ) तालीमखाना.

**इक्षुरक**–पु., **कोकिलाक्षः** ( चसू. ४.१२ ) तालीमखाना.
**काशः** ( ध. ४.१३० ) काश गवत.
**वनस्पति॰ स्थूलशरः** ( रा. ८.२१२ ) काश गवत.

**इक्ष्वाकु**–पु., **राज॰ यस्य पुत्रा राजतैलोपयोगेन गतिमायुर्बलं सुखं च लेभिरे ( का॰ फक्करोगचिकित्सा॰)**

एक राजा, ज्याच्या मुलांना राजतैलोपयोगाने आयुष्य बळ, चालण्याची योग्यता व सुख मिळाले तो.

**वैवस्वतमनोः पुत्रविशेषः** ( चचि. १९.४ )

वैवस्वत मनूचा पुत्र.

**कटुतुम्बी** ( चस. २.७ )

**अस्याः पुष्पं वमनार्थमुपयुज्यते** ( सुसू. ४३.७ )

कडू भोपळा. याच्या फुलांचा उपयोग वांती होण्याकरितां केला जातो.

**क्षीरतुम्बी** ( रा. ७.२३८ )

दुधी, दुध्या भोपळा. हा गोड, स्निग्ध, पित्तघ्न, गर्भ-पोषक, वृष्य, बलपुष्टिवर्धक आहे.

**–कल्प**–पु., **इक्ष्वाकोः कल्पः चरकसहितायां कल्प-स्थाने तृतीयाध्यायस्य नाम** ( चक. ३.१ )

अध्यायाचे नांव. इक्ष्वाकूचे कल्प या अध्यायात आहेत.

**–कुसुम**–न., **इक्ष्वाकुः कटुकालाबुः तस्याः पुष्पम्; वमनार्थमुपदिष्टम्** ( सुसू. ४३.७ )

कडु भोपळ्याचे फूल. त्याचा उपयोग वांती होण्या-करिता होतो.

**इक्ष्वादि**–वि., **इक्षुरादिर्यस्य सः** ( वर्गः )

**तृणपञ्चमूलपठितानां शरवर्जितानामिक्षुकुशकाश-शालिमूलादीनां वर्गः** ( चसि. ८.४० )

ऊस इत्यादि तृणपंचमूळातील शर मूळ वर्ज्य करून राहिलेली चार मुळे.

**इक्ष्वारिका**–स्त्री., **काशः** ( असंचि. ५ ) काश, कास.

**इङ्गितज्ञ**–वि., **मर्मज्ञः - वैद्यः** ( सुक. १.१८ )

मर्मज्ञ ( वैद्य ) मर्म जाणणारा.

**इङ्गुद**–पु., **इङ्गुदी** ( असंसू.३.२१ ) हिंगणबेट. एक झाड.

**पुत्रजीवः** ( चचि. १८.६९ )

मुलगा व्हावा म्हणून याच्या फुलाच्या माळा गळयात घालतात. पुत्रजीव वृक्ष.

**( इङ्गुदी )**–स्त्री., **वनस्पति० मदगन्धिवृक्षः तस्य त्वक् शिरोविरेचनार्थमुपयुज्यते** ( सुसू. ३९.६ )

हिंगणबेट.

**तस्या गुणाः–कटुरुष्णा, रसायनी, वातघ्नी, कफघ्नी, जन्तुघ्नी, व्रणघ्नी, फेनिला, लघुर्मदगन्धिनी च ।** ( रा. परि. ८.१७ )

N. O.—SIMA ROUBACEAE
L.—BALANITES ROXBFRG
HIVI
ENG.—DELIL

हिं.–हिंगण, हिंगोट, इंगोट.
म.–हिंगणबेट
गु –हिंगर
बं.–हिंगोर, जियापुता.
त.–नानजुंडा. इंकुणमरं

हिंगणबेटाची साल डोक्याचे रेचक म्हणून उपयुक्त. फळाचे **गुण**–तिखट, उष्ण, हलके, रसादिधातुवर्धक, वात, कफ, जंतु, व्रणनाशक, फेसाळ व हत्तीच्या मदासारखा वास येणारे.

**–क्षार**–पु., **इङ्गुदीवृक्षस्य क्षारः भेषज द्रव्य० लौह-रसायने उपयुक्तः** ( चचि. १ ( ३ ) १५ )

हिंगणबेट या झाडाचा क्षार. एक औषधीय द्रव्य लोहरसायनात उपयुक्त.

**–तैल**–न., **इङ्गुदीबीजतैलम्, तच्च प्रमेहे शाकसि-द्ध्यर्थमुपयुज्यते ।** ( सुचि. ११.६ )

**तस्या गुणाः–अनिलकफकृमिकुष्ठप्रमेहशिरोरोगाप-हरम्** ( सुसू. ४५.११५ )

हिंगणबेटाच्या बीतील मगजाचे तेल. प्रमेहात भाज्यांना फोडणीला उपयुक्त. **गुण**– वात, कफ, कृमि, कुष्ठ, प्रमेह व शिरोरोगनाशक.

**–त्वच्**–स्त्री., **इङ्गुदीवल्कलम्, धूम्रपाने उपयुक्तम्** ( सुउ. ५२.२२ )

हिंगणबेटाच्या झाडाची अंतर साल धूम्रपानात उपयोगी आहे.

**–फल**–न., **इङ्गुदीवृक्षस्य फलं, तस्य गुणाः–तिक्त-मधुरं, स्निग्धोष्णं, कफवातघ्नं च** ( चसू.२७.१४६ )

**इङ्गुदीफलान्तर्गतो मज्जा रक्तपित्तशमनः** ( सुउ. ४५.२६ )

हिंगणबेटाचे फळ गुण–कडू, गोड, स्निग्ध, उष्ण, कफ, वातनाशक आहे. याचा मगज कफपित्तनाशक आहे.

**–बीज**–न., **इङ्गुदीवृक्षस्य बीजम्** ( सुचि. २५.२२ )

हिंगणबेटाचे बी.

**–मज्जन्**–पु., **इङ्गुदीफलान्तर्गतो मज्जा** ( सुउ. ४५.२६ )

हिंगणबेटाच्या फळातील मगज. मज्जा. गर.

**–मूल**–न., **इङ्गुदीवृक्षस्य मूलम्, ग्रन्थ्यादौ लेपार्थमु-पयुज्यते** ( असंउ. ३५ )

हिंगणबेटाचे मूळ. गांठी इत्यादिकांवर लेपाकरिता उपयुक्त.

**इच्छा**—स्त्री., **आत्मगुण० इदं मम अस्त्वित्यभिलाषः, कामः, अर्थाभिलाषः** (सुशा. १.१७ सुसू. १.२५ (३) इच्छा. आत्म्याचा एक गुण. हे मला असावे. पाहिजे असा भाव व्यक्त होणारा गुण. अभिलाषा.

**इच्छाभिघात**—पु., **वाञ्छितस्याऽप्राप्तिः, वाञ्छित-पदार्थाऽनवाप्त्या अरोचकोत्पत्तिः, इच्छाभिघातः; चित्तविपर्ययजारोचकस्य निदानविशेषः। एतेन कायाग्निरुपहन्यते ततश्चाऽरोचकः** ( सुउ. ५७.१६ ) इच्छेवर आघात होणे; इच्छा पुरी न होणे. इच्छा सारखी मारली जाणे. इच्छिलेले न मिळणे. हवा असलेल्या पदार्थाची प्राप्ती न झाल्याने अरोचक होतो. इच्छाभिघात चित्तविपर्ययजन्य अरोचकाचे एक विशेष कारण आहे. त्याने पाचक अग्नीचा नाश होतो व नंतर अरोचक होतो.

**इज्या**—स्त्री., **यागः** ( सुशा. ४.८१ ) यज्ञ, याग, होम.

**इडाजात**—पु., **गुग्गुलुः** ( रा. १२. १८८ ) गुग्गूळ.

**इण्डरी**—स्त्री., **पक्वान्नः ( वै. श. सिं. ) पदार्थ०** ( असंउ. ४९ ) एक पक्वान्न. इडली.

**इत्कट**—पु., **शर०** ( **इन्दुः**, असंचि. १३ ) शर. बाण, एक दर्भ, काश.

**वनस्पति० महती खगाली** ( सुचि. ७.९ ड. ) बोरू, देवनळ, पांढरा वेत.

**सूक्ष्मपत्रिका दीर्घलोहितयष्टिका काण्डविशेषरूपा 'इकडी' इति लोके (अरुणदत्तः** अहृसू. १५.२४) लाल बोरू.

**तृणविशेषः, स्तन्यजननगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१२ ) एक गवत, दूध निर्माण करणाऱ्या द्रव्यांपैकी एक, काशतृण, काश गवत.

**—मूल**—**शरभेदविशेषस्य मूलम्; स्तन्यजननं मूत्रविरेच-नीयं च** ( चसू. ४.१२.१५ ) दर्भ, शर या वर्गातील वनस्पतीचे मूळ, दूध उत्पन्न करते व लघ्वी अधिक करते.

**इन्दीवर**—न., **नीलोत्पलं, नीलपद्मम्** ( सुशा. ४.७२ ) नील कमल, निळे कमळ.

**दीर्घपत्रो बहुलपुष्पः कर्णपूरकाख्यः शरबालिका-भेदः** (सुचि. ७.११.१७) ताड, वाळा, केळ, केवडा.

**कुरण्टकभेदो दीर्घपत्रो बहुलपुष्पः क्षुपविशेषः** ( सुसू. ३८.१२ ) कोऱ्हांटीचा एक प्रकार; लांब पानाचे पुष्कळ फुलांचे झुडुप, पेंढरी.

**इन्दीवरी**—स्त्री., **वनस्पति० गुणाः—कटुः शीता पित्तश्लेष्मा-पहारिका चक्षुष्या कासदोषघ्नी व्रणकृमिहरा च इन्दीवरी युग्मफला दीर्घवृंतोत्तमारणी। पुष्प-मञ्जरिका द्रोणी करम्भा नलिका च सा ॥** ( रापरि. ३.२७ ) महाशातावरी एक जोड फळांची वनस्पति गुण—तिखट, थंड, पित्त-कफनाशक, डोळ्याला हितावह, खोकला, व्रण व कृमिनाशक.

**—कन्द**—पु., **कमलकन्दः, कन्दवर्गे एकः** ( सुसू. ४६.२९८ ) कमळाचा—निळ्या कमलाचा कांदा. कंदवर्गातील एक कंद.

**इन्दीवरिणी**—स्त्री., **वनस्पति० उत्पलिनी** ( रा. १०.२५० ) निळ्या कमळाची वेल.

**इन्दु**—पु., **अष्टाङ्गसंग्रहस्य, अष्टाङ्गहृदयस्य च 'शशिलेखा'। टीकायाः कर्ता, आचार्यवाग्भटस्य शिष्येषु प्रधानः** - अष्टाङ्गसंग्रह व अष्टांगहृदयाच्या 'शशिलेखा' या टीकेचा कर्ता वाग्भटाचार्यांचा एक मुख्य शिष्य.

**संख्यासंकेतः; एक संख्याया संकेतशब्दः** ( र. २६.५४ ) एक या संख्येचा संकेतवाचक शब्द.

**कर्पूरः**, ( ध. ३.३१ ) कापूर.

**चुक्रिकाशाकम्** ( र. १६.५८ ) एक भाजी; अंबाडा

**प्रसारणी** ( र. १६.५८ ) चांदवेल.

**—कमल**—न., **कुमुदम्** ( रा. १०.२४६ ) कुमुद नावाचे कमळ.

**—कलिका**—स्त्री., **केतकी** ( रा. १०.२ ) केतकी, केवडा, केवडी.

**—खण्डा**—स्त्री., **कर्कटशृङ्गी** ( रा. ६.१११ ) काकडशिंगी.

**—पुष्पिका**—स्त्री., **कलिकारी** ( फ. ४.९ ) कळलावी, लांगली, खड्या नाग.

**—रत्न**—न., **मौक्तिकम्** ( र. २३.३९ ) मौक्तिक, मोती.

**—राजी**—स्त्री., **बाकुची** ( असंउ. ४४ ) सोमराजी, बाकुची, बावची.

**—रेखा**—स्त्री., **बाकुची** ( र. १८.४७ ) बाकुची, बावची.

**—लेखा**—स्त्री., **बाकुची** ( ध. १.१६६ ) बाकुची, बावची.

**—लोहक**—न., रौप्यम् ( रा. १३.८ ) चांदी, रुपे.

**—शफरी**—स्त्री., अश्मन्तकः ( रा. ९.२९० )
अश्मन्तक, आपटा, घोळ, चुका, कोरळ.

**इन्दुक**—पु., अश्मन्तकः ( रा. नि. ९.२९० )
अश्मन्तक, पाषाणभेद.

**—कन्द**—पु., शाक० केसुककन्दः ( चसू. २७.११४ )
एक प्रकारचा भाजीचा कांदा.

**इन्द्र**—पु., देवता० देवानामधिपतिः भरद्वाजाय आयुर्वेदं दत्तवान् ( चसू. १.३ )
**आयुर्वेदतन्त्रं ब्रह्मा प्रोवाच ततः प्रजापतिः अधिजगे तस्माद् अश्विनौ अश्विभ्याम् इन्द्रः भृग्वादिमहर्षिभ्यो रसायनं वाजीकरणं चोपदिदेश**
( सुसू. १.२०; चचि. १.४ )
**श्लेष्मप्रकृतिदेवः** ( सुशा. ४.७६ )
**हस्तयोरधिदैवतमिन्द्रः** ( सुशा. १.७ )
**'सत्वमिन्द्रोऽभिरक्षतु' इति रक्षामन्त्रः,**
( सुसू. ५.२६ )
देवांचा राजा. भरद्वाजाला इन्द्राने आयुर्वेद शिकविला आयुर्वेद शास्त्र ब्रह्मदेवाने प्रतिपादन केले ते प्रजापतीने ग्रहण केले; त्याचेकडून अश्विनीकुमारांनी व त्यांचेकडून इंद्राने ग्रहण केल्यावर तो भृगु आदि महर्षींना रसायन वाजीकरण सांगता झाला. इंद्र हा कफप्रकृतीचा देव. हात या इंद्रियाचे ते दैवत. सत्वमिन्द्रोऽभिरक्षतु' असा रक्षणार्थ जपावयाचा व इतर विधीकरतां उपयोगात आणावयाचा मंत्र म्हटला जातो.
**सूर्यः** ( असंशा. १२. ) सूर्य, भानु, रवि, आदित्य.
**इन्द्रनीलसंज्ञको मणि०** ( सुसू. ४६.३२९.३३० )
इंद्रनीळ, नीळ, शनीचा खडा.

**—कील**—पु., स्थान० **इन्द्रार्थं कीला न्यस्यन्ते यस्मिन् देशे स प्रदेशः यागार्थं निखातयूपोपलक्षितः ।**
( सुचि. २४.८९ )
इंद्राकरिता म्हणजेच यज्ञयागाकरिता ज्या स्थानाची योजना केली त्या स्थानाभोंवती व त्या स्थानामध्ये संकेताप्रमाणे खुंट, खिळे; इ० ठोकून आखलेली जागा.

**—गोप**—पु., **मृगनक्षत्रे संजातो रक्तवर्णकः लघुकीट०**
मृगनक्षत्रात उत्पन्न झालेला लाल रंगाचा लहान किडा. वीरबहुटी, मृगकिडा.
**अस्य गुणाः—उष्णो, रूक्षोऽर्धावभेदकतन्द्रादिकफप्रधानरोगनाशनो, योनिशैथिल्यनाशनश्च ।**
( र. २२.१२५ ) ( चचि. ३०.२२६ )
**इन्द्रगोपकसंयुक्तं केतकीस्वरसं सैन्धवं स्वर्णपुष्पिकां वैक्रान्तं च सर्वं भाण्डे विनिक्षिपेत्सप्ताहं स्वेदयेत्तस्मिन्; अनया रीत्या वैक्रान्तद्रुतिर्भवति**
( र. ४.७६ )
**गुण**—उष्ण, रुक्ष, अर्धे डोके दुखणे, झापड इत्यादि कफाधिक रोग व योनीची शिथिलता नाशक.
**वैक्रांताची द्रुती**—इंद्रगोप किडा, केवड्याचा रस, काटे धोत्र्याचा रस, सैंधव व वैक्रांत ही एकत्र एक आठवडा शिजवावी म्हणजे द्रुती होते.

**—गोपक**—पु., इन्द्रगोपः ( चचि. ३०.२२६ )
वीरबहुटी, मृगकिडा, तांबडा किडा.

**—चिर्भिटा**—स्त्री., इन्द्रवारुणी ( रा. ३.३७१ )
इन्द्रायण, कडु इंद्रायण, कवंडळ.

**—द्**—पु., **सप्तविंशतिसंख्याकेष्वन्यतमो रससिद्धिप्रदायकः** ( र. १.३ )
सत्तावीस रससिद्धांपैकी एक रससिद्ध.

**—दारु**—पु., देवदारुः ( ध. १.७६ ) देवदार.

**—धनुस्**—न., **मेघावृते नभसि सूर्यकिरणैः संजाता सप्तवर्णयुता भासमाना धनुराकृतिः**
( असंसू. ४.४१ )
मेघांनी भरलेल्या आकाशात सूर्यकिरणांनी सात वर्णांचे भासमान होणारे धनुष्य. पाऊस पडत असता सूर्य किरणांनी सात वर्णांचे आकाशात भासमान होणारे धनुष्य.

**—धूम**—पु., **प्राचीनो रसाचार्यः** ( र. ६.४९—५३ )
एक प्राचीन रसाचार्य.

**—नील**—पु., **नीलवर्णो मणि०** ( असंसू. ४.४० )
नीलम, नीलमणी, नीळ. शनीचा खडा.

**—पर्णी**—वनस्पति० **इन्द्रपुष्पी, लाङ्गलिकी**
( सुचि. १७.१५ ) कळलावी.

**—पुष्पी**—स्त्री., वनस्पति० **कण्टकीकृष्णपुष्पकरञ्जः वृक्षः** ( सुसू. ३८.१६ )
काळ्या फुलांचा करंज; काटेकरंज.
**लाङ्गलकी, कलिकारी इत्यर्थः** ( सुसू. ३८.१७ )
कळलावी.

**—बस्ति**—पु., मर्म० **पार्ष्णिं प्रति त्रयोदशाङ्गुले जङ्घामध्ये अधःशाखायां तथैव करमूलंप्रति प्रकोष्ठमध्ये ऊर्ध्वशाखायाम् स्थितं कालान्तरप्राणहरमर्धाङ्गुलपरिमितं मांसमर्मेदम्, तत्र विद्धे सति शोणितक्षयेण मरणं भवति । संख्या**—**प्रतिशाखमेकम् एवं चत्वारि** ( सुशा. ६.६ )

एक मर्म. टाचेच्या वर तेरा अंगुळे पिंढरीमध्ये पायात व हातात कोपराखाली मनगटांच्यावर हे मर्म आहे. अर्धा अंगुळ मापाचे मांसमर्म आहे. सात दिवसानंतर मृत्यु आणणारे. रक्तस्राव होऊन मृत्यु येतो. प्रत्येक शाखेत एक अशी चार मर्मे होत.

**–बीज**–न., **इन्द्रयवः कुटजबीजम्** ( सुसू. ४४.२७ )
इन्द्रयव, इंद्रजव, कुडाबीज, कुड्याचे बी.

**–मद्**–पु., **जलौकारोगः असम्यग्वमनात् सततं च निपातनाज्जायमानोऽयं जलौकसां रोगः; अष्टांगहृदये 'रक्तमद' इति नाम्ना तस्य निर्देशः, अनेन रोगेण पीडिता जलौका न चेष्टते सलिलं प्राप्य च सीदति; रक्तावसेचने तस्याः प्रयोगो निषिद्धः**
( सुसू. १३.२२; अहृसू. २६-३९ )
हा जळवांचा विकार आहे. रक्त शोषल्यानंतर जळवा पिळून रक्त नीट काढले नाही तर हा रोग होतो. याला रक्तमदही म्हणतात. याने जळू हालचाल करीत नाही, पाण्याने ती गळाठल्यासारखी होते, रक्त काढण्याला ती निरुपयोगी.

**–मुष्कक**–न., **कन्दविषः** ( असंउ. ४० )
एक कन्दजन्य विष.

**–यव**–पु., **कुटजबीजम्, कुटजवृक्षकस्य यवाकृतिबीजवत्त्वात्।** कुड्याचे बी, इन्द्रजव.
**गुणाः–कटुस्तिक्त उष्णः ( शीतः इति राजनिघण्टौ ) दीपनः रक्तार्शोनाशनः अतिसारवमिशूलघ्नः, त्रिदोषघ्नश्च।** ( चक. ५.४ सुसू. ३८.६ ध.२.१५ )
ENG.-SEEDS OF HOLARR HENA
ANTI DYSENTERICA
गुण–तिखट, कडु, उष्ण, दीपक, रक्तमूळव्याध, अतिसार, वांती, शूळ व त्रिदोषनाशक.

**–लुप्त**–न., **रोग० क्षुद्ररोग०** चाई.
**रोमकूपानुगं पित्तं वातेन सह मूर्च्छितं, रोमाणि च्यावयति, ततः श्लेष्मा स शोणितो रोमकूपान् रुणद्धि ततोऽन्येषां रोम्णामसंभवः**
( सुनि. १३.३३.३४ )
**इन्द्रलुप्तं श्मश्रुणि भवति, इति कार्तिकः। (मानि.)**
**पर्यायशब्दाः–खालित्यं, रुज्या, रुह्या, खल्लिः**
( अहृउ. २३.२६ )
**लवणरसस्याऽतियोगोऽस्य एको हेतुः**
( चसू. २६.४३ ( ३ )
**इन्द्रलुप्ते वाग्भटमतेन केशानां शातनं सहसा भवति**
( अहृउ. २३.२६९ )
**तत्र चिकित्सा–इन्द्रलुप्ते स्निग्ध-स्विन्नस्य मूर्ध्नि सिरां मोक्षयेत्। शिलाकासीसतुत्थकैः समरिचैः कल्कैर्लेपः कार्यः, अथवा कुटन्नटदारुकल्कैर्लेपनं शस्तम्, अवगाढं प्रच्छयित्वा गुञ्जाकल्कैर्मुहुर्मुहुर्लेपयेत्।** ( सुचि. २०.२४ तः २६ )
**तथैव इन्द्रलुप्तापहम् अभ्यञ्जने शस्तं मालत्यादितैलम्** ( सुचि. २०.२६ )
ALOPESIA
**चाई**–केसांच्या मुळाशी पित्त वाताने युक्त व दुष्ट होऊन केस मुळातून नाहीसे करते. व नंतर रक्तासह कफ तेथे मार्ग रुद्ध करतो म्हणून दुसरे केस येत नाहीत. केस एकदम गळतात. हा रोग दाढी मिशी इत्यादी मध्ये होतो. त्याचे चार पर्याय वर दिले आहेत. मिठाचा किंवा लवणरसाचा अति उपयोग केल्याने हा होतो. **उपचार**–पोटात स्नेहन, डोक्याला अभ्यंग करून शेकून तेथली शीर तोडावी. मनशीळ, हिराकस, मोरचूद, मिरी यांचा लेप किंवा नागरमोथा, देवदार यांच्या चटणीचा लेप करावा. अगोदर खोल फासण्या पाडून रक्त काढून गुंजांची चटणी मधुन मधून लावावी. तसेच जात्यादितेल इत्यादी सिद्ध तेलाचा अभ्यंग करावा.

**–वज्राग्नि**–पु., **विद्युत्तेजोदग्धः आगन्तुकरोगः**
( सुसू. १२.३९ )
अंगावर वीज पडून जळालेला. विजेने भाजलेला; हा आगंतुक रोग.

**–वडवा**–स्त्री., **जातहारिणी, रेवतीग्रह०** ( का० रेवतीकल्प० ५५ )
जन्म होताच बालकाला मारणारा एक प्रकारचा रेवती ग्रह.

**–वल्लरी**–स्त्री., **इन्द्रवारुणी** ( रा. ३.३७२ )
इंद्रायण, इंद्रवारुणी, कडुइंद्रावण, कवंडळ.

**–वल्ली**–स्त्री., **वनस्पति० मत्स्याक्षकः मत्साण्डकः गण्डदूर्वा इति वा** ( सुउ. २८.७ )
गांठी दूर्वा. कवंडळ.
**वनस्पति० ऐन्द्री** ( असंउ. ६ )
लघुकवंडळ, वेलची, सुंठ.

**–वारु**–पु., **इन्द्रवारुणी** ( ध. १.२४८ )
कवंडळ. इंद्रावण, इंद्रायण.

**–वारुणिका**–स्त्री., **इन्द्रवारुणी** ( र. १२.२९७–९८ )
इन्द्रायण, कडुइंद्रावण, कवंडळ.

**–वारुणी**–वनस्पति० लता० ( ध. १.२४८ )
**गुणाः–कटुका–तिक्ता–अत्युष्णा** ( ध ) **शीता** ( रा )
**रेचनी–कफघ्नी–कृमि–व्रणोदरगुल्मकुष्ठज्वरापहा ।**
N. O. CUCURBETACEAE
L.—CETRULLUS COLOCYNTHIS
ENG.—BITTER CUCUMBER
हिं.—इन्द्रायण, फरफेंदु, बडी इन्द्रफला
म.—कडु **इन्द्रावण, कवंडळ,** लघु **इन्द्रावण.**
गु.—इंदरवाणियु, गावसुकणु, इन्द्रवरुणा.
बं.—राखालशशा, राखालताड्डु, कुंदरुकीबडमाकाल.
त.—पेयिकोम्मट्टी.
फा.—खुर्जयल्तल्ख.
गुण–तिखट, कडु, अति उष्ण, किंवा अति थंड नव्हे, रेचक, कफनाशक, कृमि, व्रण, उदर, गुल्म, कुष्ठ व ज्वरनाशक.

**–वृक्ष**–पु., **कुटजः** ( सुउ. ६१.३४ )
कुटज वृक्ष; कुड्याचे झाड, कुडा.
**देवदारुः** ( ध. १.७७ ) देवदार, देवदाराचे झाड.

**–वृद्धा**–स्त्री., **रोग० क्षुद्ररोगेष्वेकः**
**लक्षणम्–वातपित्तोत्था पद्मपुष्करवत् मध्ये पिडकाभिः समाचिता पिडकी** ( सुनि. १३.११ )
**अ. संग्रहे तु सैव विद्धेति नाम्नोल्लिखिता** ( असंउ. ३६ )
**तत्र चिकित्सा–पित्तजविसर्पवत् क्रिया कार्या, मधुरौषधैः सिद्धैर्घृतैः रोपणीया** ( सुचि. २०.७–८ )
एक क्षुद्र रोग. अनेक बारीक बारीक पुळ्यांनी युक्त. मोठी पुळी. विद्धा असेही हिला म्हणतात.
**उपचार**–पित्तज धावऱ्यासारखे.
गोड औषधांनी तयार केलेल्या तुपाने जखमा भरून आणाव्या.

**–सुरा**–स्त्री., **इन्द्रवारुणी** ( सुचि. ३७.३४ )
कवंडळ, कडु इंद्रावण.

**–सूनु**–पु., **अर्जुनः** ( रानि. ९.१९२ )
अर्जुनवृक्ष, अर्जुनसादडा.

**इन्द्रा**–स्त्री., **कोकिलाक्षः** ( चक. ७.१९ )
इक्षुरक, तालीमखाना.

**इन्द्राक्ष**–पु., **ऋषभकः** ( ध. १.१२५ )
ऋषभक, अष्टवर्गापैकी एक.

**इन्द्राणिशाक**–न., **वनस्पति० मत्स्याक्षकम्**
**निर्गुण्डी वा** ( चचि. २१.९० ) निर्गुंडी.

**–घृत**–न., **लशुनादिसिद्धघृत० राजयक्ष्मचिकित्सिते उपयुक्तम्** ( **काचि. राजयक्ष्माचिकित्सा** )
लशुन इत्यादि द्रव्यांनी सिद्ध घृत. क्षयरोगात उपयोगी.

**इन्द्राणी**–स्त्री., **इन्द्रवारुणी** ( र. २१.२७ )
इंद्रायण, कडूइंद्रावण, कवंडळ; वेलची, निर्गुंडी.
**शेफाली निर्गुंडी** ( रा. ४.११९ ) निर्गुंडी.
**वनस्पति, भद्रैला** ( **स्थूलैला** रा. ६.७१ )
मोठी वेलची.
**कृष्णनिर्गुण्डी** ( चचि. २१.८५ ) काळी निर्गुंडी.

**इन्द्राभ**–पक्षि–पु., **मल्लकङ्कः** ( चसू. २७.४९ )
एक पक्षी.

**इन्द्रायुध**–न., **शक्रधनुः** ( सुसू. १३.११ ) इन्द्रधनुष्य.
**हीरकम्, खनिजोपल०** ( रा. १३.५८ ) हिरा.
**विष० कन्दविष०** ( असंउ. ४० )
एक प्रकारचे कन्दविष.

**( इन्द्रायुधा )**–स्त्री., **सविषजलूकानामन्यतमा, इन्द्रायुधवदूर्ध्वराजिभिश्चित्रिता** ( सुसू. १३.११ )
विषारी जळूचा एक प्रकार. इंद्रधनुष्यासारख्या रेषा जिच्या अंगावर असतात ती.

**इन्द्राह्वा**–स्त्री., **इन्द्रवारुणी** ( ध० १-२४८ )
कडु इंद्रावण, कवंडळ.

**इन्द्रिय**–न., **पुरुषस्य विषयज्ञानार्थं कर्मार्थं वा साधनीभूतः शारीरभावविशेषः । अवयवविशेषो वा इन्द्रियं द्विविधं ज्ञानेन्द्रियं कर्मेन्द्रियं च । तत्र श्रोत्रत्वक्चक्षुर्घ्राणरसनसंज्ञकानि पञ्च ज्ञानेन्द्रियाणि बाह्यानि, मनश्चाऽन्तरिन्द्रियं, वाक्पाणिपादपायूपस्थानि पञ्च कर्मेन्द्रियाणि, एवम् एकादशेन्द्रियाणि उभयात्मकं मनः** ( सु. शा. १.४ )
**तानि पाञ्चभौतिकान्यस्मद्दर्शने प्रतिक्षणं क्षीयमाणानि च** ( चचि. १५.१२ **चक्र।** )
**इन्द्रियोत्पत्तिः–वैकारिकादहङ्कारात्तैजससहायात् कफरक्तवाहिनां स्रोतसां महाभूतानां च प्रसादाद्वा** ( सुशा. १.४; असंशा. ५.५० )
पुरुषाला विषयाचे ज्ञान होण्याकरिता किंवा कर्म करण्याकरिता साधन म्हणून उपयुक्त होणारा शरिरातील एक घटक. इन्द्रिये दोन प्रकारची; ज्ञानेंद्रिये व कर्मेंद्रिये. कान, त्वचा, डोळा, नाक, व जीभ ही बाह्य ज्ञानेंद्रिये. वाचा, हात, पाय, गुद व जननेंद्रिये ही पाच कर्मेंद्रिये. ही दहा बाह्येंद्रिये होत. मन हे अंतरिंद्रिय आहे ते ज्ञानेंद्रिय आणि कर्मेंद्रिय असे उभयात्मक आहे. इतर शास्त्रात इंद्रिये अभौतिक

समजली जातात, परंतु वैद्यकात भौतिक समजली जातात. ती प्रतिक्षणी क्षीण होणारी आहेत. वैकारिक अहंकार, तेजोमहाभूताचे साह्य अथवा कफ, रक्तवाही स्रोतसे आणि महाभूतांचे स्वच्छ स्वरूप हेही उत्पत्तीस कारण असते.

**बुद्धीन्द्रियम्** ( चसू. ८.७; चशा. १.२२ )
**केवलचक्षुरादिपंचज्ञानेन्द्रियाणि**
डोळा वगैरे पांच ज्ञानेंद्रिये.

**शुक्रम्** ( चचि. ३०.१२६; सुउ. ५५.४ )
पुरुषाचे वीर्य.

**मूत्रेन्द्रियम्, मूत्रमार्गः** ( का. मूत्रकृच्छ्रचि. )
मूत्रेंद्रिये, मूत्रमार्ग.

**रिष्टम्, अरिष्टम् वा** ( चइ. १.१ )
**इन्द्रशब्देन प्राण उच्यते, तस्यान्तर्गतस्य लिङ्गं रिष्टाख्यम्** ( चइ. १.१ चक्र. )
मरणसूचक लक्षण. इंद्र म्हणजे प्राण; तो शरिरातून बाहेर जाण्याचे चिन्ह म्हणजे रिष्ट.

पु., **इन्द्रियाध्यायः इन्द्रियस्य रिष्टरूपस्य प्रतिपादकोऽध्यायः इन्द्रियः**
( चवि. ८.१२४; चइ. ११ चक्र. )
रिष्टरूप इंद्रियाचे प्रतिपादन करणारा अध्याय; तो इंद्रियाध्याय.

**भौतिकाधिष्ठानशक्तिरूपम् इन्द्रियम्**
( सुसू. १५. ४०. ड. )
भौतिक अधिष्ठान असलेले शक्तिस्वरूप इंद्रिय.

**–ज**–वि., **इन्द्रियजातः व्याधिः** ( चसू. २८.२९ )
इंद्रियाची दुर्बलता

**–दौर्बल्य**–न., **रोगलक्षण० इन्द्रियगतशक्तिन्यूनत्वमिन्द्रियाधिष्ठानदौर्बल्यं वा** ( सुसू. २०.१९ )
इंद्रियाची दुर्बलता.

**–द्रव्य**–न., **ज्ञानेंद्रियाणां प्राधान्येनाऽऽरम्भकं द्रव्यम्, पञ्चेंद्रियद्रव्याणि खं वायुर्ज्योतिरापो भूरिति।**
( चसू. ८.९ )
ज्ञानेंद्रियांचे प्राधान्येन आरम्भक म्हणजे आरंभ करणारे–निर्माण करणारे द्रव्य ( भौतिक द्रव्य–आकाशादि पंचमहाभूते. )

**इन्द्रियपोषकद्रव्यम्, पुष्यन्ति त्वाहाररसात् रसरुधिरपंचेंद्रियद्रव्याणि धातुप्रसादसंज्ञकानि ।**
( चसू. २८.४ )
इंद्रियपोषक द्रव्य. आहार रसातील पोषक द्रव्ये कोष्ठाग्नीतील त्या त्या धात्वग्नीच्या अंशाने पचविलेली असतात. त्यातील पंचेन्द्रिय द्रव्यांची पोषक द्रव्ये ही त्या त्या अग्नीने पचविलेली असतात. ती पोषक इंद्रियद्रव्ये होत. वर दर्शित केलेली इंद्रियद्रव्ये पोष्य होत.
आहाररसाने रस रक्तादि धातु व त्यांची सारभूत धातु प्रसाद संज्ञक पंच इंद्रियद्रव्ये यांचे पोषण होते.

**–प्रवृत्ति**–स्त्री., **स्वस्वविषयोपलब्धौ इन्द्रियाणां प्रवर्तनम्** ( चसू. ८.५ )
आपापल्या विषयाच्या प्राप्तीकरितां इंद्रियांची प्रवृत्ति.

**–प्रसाद**–पु., **इन्द्रियाणां स्वस्वविषयग्रहणसामर्थ्यम्**
( सुसू. ४६.३ )
आपापल्या विषयाचे ग्रहण करण्याची इंद्रियांची क्षमता.

**–प्राणवह**–वि., **इन्द्रियसंचारी प्राणो येन मार्गेण वहति ( गच्छति ) स गमनमार्गः** ( चसि. ९.४ )
इंद्रियात संचार करणारा प्राण ज्या मार्गाने संचार करतो, वहातो, जातो, तो गमनमार्ग.

**–बुद्धि**–स्त्री., **तेन तेन कारणभूतेन चक्षुरादिना इन्द्रियेण जायमानं ज्ञानम् यथा, चक्षु–बुद्धिः पुनः क्षणिकं नामचाक्षुषं ज्ञानं तच्च निश्चयात्मिका च;**
( चसू. ८.३–१२ )
कारणभूत होणाऱ्या त्या त्या चक्षु इत्यादी इंद्रियाने होणारे ज्ञान; जसे चक्षुर्बुद्धिः म्हणजे डोळ्याने होणारे चाक्षुषज्ञान. ते क्षणिक आणि निश्चयात्मक असे दोन प्रकारचे आहे.

**–बोधन**–वि., **इन्द्रियपाटवकरम्** ( सुसू. ४५.१७१ )
इन्द्रियांना आपापले विषय ग्रहण करण्याकरिता निष्णात करणारे, उद्युक्त करणारे.

**–वध**–पु., **लक्षण० ज्ञानेन्द्रियाणां कार्यनाशः कुपितवातस्य लक्षणम्, इन्द्रियवधं इत्यनेनाश्रुत्य घ्राणादर्शनारसनास्पर्शानि वेदितव्यानि**
( चचि. २८.२९; सुनि. १.२४ )
एक लक्षण; ज्ञानेंद्रियाच्या कार्याचा नाश, नाक इ. ज्ञानेंद्रियाचा नाश. कुपितवायूचे लक्षण.

**–विज्ञान**–न., **इन्द्रियगतरिष्टविज्ञानम्**
( चइ. ४,२७ )
इन्द्रियांसंबंधी होणारी जी रिष्ट लक्षणे त्यांचे ज्ञान.

**–शुद्धि**–स्त्री., **इन्द्रियाणां पाटवं, वैमल्यम्**
( चसू. १६.६ )
इंद्रियांची शुद्धि, विमलत्व; इंद्रियांचे कौशल्य.

**-संशुद्धि**–स्त्री., घ्राणादीन्द्रियगतदोषशोधनम् ( चसू. ५.३७ )
घ्राणादि इंद्रियात असलेल्या दोषांची शुद्धि.

**-संश्रय ( संभव )**–वि., बाह्येन्द्रियजन्यम् ( चइ. ४.५ ) बाह्येंद्रियांपासून उत्पन्न होणारे.

**-स्थान**–न., स्थानविशेषः, इन्द्रियस्य रिष्टस्य स्थानमिन्द्रियस्थानम् ( चइ. १.१ )
ग्रंथातील एक स्थान. इंद्रियांचे म्हणजे रिष्ट लक्षणांचे जे स्थान ते.

**इन्द्रियाच्छय**–न., चक्षुरादीनां स्वस्वविषयेषु पाटवम् ( चसि. १.५१ )
चक्षुरादि इंद्रियांचे आपापल्या विषय ज्ञानाचे कौशल्य, कार्यक्षमता.

**इन्द्रियात्मन्**–पु., इन्द्रियाणां श्रोत्रादीनां स्वस्वक्रियाहेतुः–( आत्मा ) ( चशा. ४.८ )
श्रोत्रादि इंद्रियांच्या आपापल्या क्रिया-करण्याचे कारण ( इंद्रियात्मा ) होय.

**इन्द्रियाधिकार**–पु., इन्द्रियम् अधिकृत्य कृतं प्रकरणम् ( चसू. ८.३ ) इन्द्रिय हा विषय घेऊन त्याच्या ज्ञानाकरिता केलेले प्रकरण.

**इन्द्रियाधिष्ठान**–न., शारीर० ज्ञानेन्द्रियस्य आश्रय–स्थानावयवः, यथाऽक्षि चक्षुरिन्द्रियस्याधिष्ठानम् ( चसू. ८.३ )
एक शारीर भाग. ज्ञानेंद्रियाचे आश्रयस्थान. आश्रयाचा अवयव. जसे–डोळा हा चक्षु ह्या इंद्रियाचे स्थान.

**इन्द्रियानीक**–न., ज्ञानेन्द्रियाणामानीकं समूहः तस्य रिष्टान्यधिकृत्य कृतोऽध्यायः चरकसंहितायामिन्द्रियस्थाने चतुर्थोध्यायस्य नाम ( चइ. ४.१ )
इंद्रियांच्या समूहाची अरिष्टे दृष्टीपुढे ठेवून त्यांबद्दल विवरण करण्याकरिता सांगितलेला अध्याय.

**इन्द्रियाभिग्रह**–पु., इन्द्रियेऽधिष्ठानम्, मनसः एकं कर्म ( चशा. १.२१ )
इंद्रियात जाणे–इंद्रियात रहाणे; तेथे इंद्रियांना विषयग्रहणाचे काम करण्यास मदत करणे. हे मनाचे एक कर्म आहे.
( चशा. १.२२; चसू. ८.३ )

**इन्द्रियायतनदोष**–पु., ज्ञानेन्द्रियस्थानस्य रोगो ज्ञानेन्द्रियस्थानविनाशो वैकल्यं वा ( सुसू. २४.९ )
ज्ञानेंद्रियाच्या स्थानाचा दोष, रोग, वैकल्य किंवा नाश.

**इन्द्रियार्थ**–पु., चक्षुरादिज्ञानेन्द्रियग्राह्यो विषयः, शब्दस्पर्शरूपरसगन्धाः पञ्चविषयाः
चक्षुरादि ज्ञानेन्द्रियांना ग्रहण करण्यासारखे विषय. शब्द स्पर्श रूप रस गंध.

**इन्द्रियोपक्रमणीय**–वि., अध्यायसंज्ञा० इन्द्रियोपक्रमणमधिकृत्य कृतोऽध्यायः। ( चसू. ८.१ )
एका अध्यायाचे नाव. इंद्रियांचे हीनमिथ्यातियोग इत्यादी सांगण्याचा उपक्रम या अध्यायात केला आहे म्हणून इंद्रियोपक्रमणीय असे या अध्यायाचे नाव आहे.

**इन्द्रियोपघात**–पु., लक्षण० ज्ञानेन्द्रियनाशः ( असंसू. ३० )
ज्ञानेंद्रियांचा नाश. इन्द्रियांची हानि.

**इन्द्रियोपताप**–पु., लक्षण० चक्षुरादीनामिन्द्रियाणां स्वकर्मगुणहानिः ( सुसू. ४२.१० (३)
चक्षुरादि इंद्रियांच्या गुणकर्मांची हानि.

**इन्द्रियोपशम**–पु., लक्षण० इन्द्रियस्य निग्रहः ( असंसू. ५. )
इंद्रियांच्या हीनमिथ्यातियोगाच्या अनिष्ट परिणामांचा उपशम. इंद्रियनिग्रह.

**इन्द्रियोपशयः**–वि., इन्द्रियानुपघातकं, इन्द्रियसुखावहम् ( चवि. ८.१५१ )
इंद्रियांना सुखावह, आरोग्यकर, घातक न होणारे.

**इन्द्रोक्तरसायन**–न., इन्द्रेणोक्तो रसायनकल्पः
इंद्राने सांगितलेला रसायन कल्प.
**अस्मिन् रसायने निम्ना हिमवत्प्रभवाः दिव्याश्चौषधयो भवन्ति–ऐन्द्री, ब्राह्मी, पयस्या, क्षीरपुष्पी, श्रावणी, महाश्रावणी, शतावरी, विदारी, जीवन्ती, पुनर्नवा, नागबला, स्थिरा, वचा, छत्रा, अतिच्छत्रा, मेदा, महामेदा, जीवनीयाश्चान्याः। सेवनविधिः फलञ्च–पयसा प्रयुक्ताः षण्मासात्परमायुर्वयश्च तरुणमनामयत्वं स्वरवर्णसंपदमुपचयं मेधां स्मृतिमुत्तमबलमिष्टांश्चापरान् भावना-वहन्ति सिद्धाः** ( चचि. १. ( ४ ) ६ )
या रसायनात वर मुळात सांगितलेल्या औषधि आहेत. सेवन करण्याचा विधी व फळ–दुधाबरोबर घेतल्याने सहा महिन्यानंतर तारुण्य, आरोग्य, स्वर, वर्ण, पुष्टि, बुद्धि, स्मरणशक्ती, उत्तम बळ व इतरही इष्ट सुधारणा होतात व आयुष्य वाढते.

**इन्धन**–न., अग्नेराहारः ( अहृसू. ३.८ )
अग्नीचा आहार, जळण, लांकूडफाटा, सर्पण.

**इभ**–पु., **हस्ती, गजः** ( सुउ. ५६.२५ ) हत्ती.

**( इभा )**–स्त्री., **हस्तिनी** ( सुउ. ४१.४९ ) हत्तीण.

**–कणा**–स्त्री., **गजपिप्पली** ( सुउ. ५२.४२ ) गजपिंपळी.

**–कण्टिका**–स्त्री., **गोक्षुरः** ( र. १५.४० ) गोखरू.

**–कर्णिका**–स्त्री., **वनस्पति० गजकर्णीति प्रसिद्धा, अर्शःप्लीहग्रहणीकुष्ठादिनाशने मूलकुठाराख्ये रसयोगे उपदिष्टा** ( र. १५.४० )
हस्तिकर्णी, गजकर्णी, एरंड. मूळव्याध, प्लीहा, ग्रहणी, कुष्ठविकारनाशक, मूलकुठार नांवाच्या कल्पामध्ये एरंड आहे.

**–कृष्णा**–स्त्री., **गजपिप्पली** ( सुउ. ५२.३८ ) गजपिंपळी.

**–केसर**–न., **नागकेसरम्** ( सुचि. ३८.५२ ) नागकेशर.

**–गन्धा**–स्त्री., **स्थावरफलविषभेदः** ( सुक. २.५ ) बारा प्रकारच्या फळविषातील एक.

**–पुट**–न., **गजपुटम्, त्रिंशदङ्गुलमिते खाते घटसंपुटितमौषधं संस्थाप्य ऊर्ध्वाध उपलानि स्थापयित्वा परिपचनम्** ( र. २.१९ )
गजपुट. तीस अंगुळाच्या लांबीरुंदी व खोलीच्या खड्ड्यात परळाच्या संपुटात औषध घालून ते बंद केलेले परळाचे संपुट खालीवर शेण्या घालून त्या पेटवून औषधाचे पचन करणे म्हणजे गजपुट.

**–शुण्डी**–स्त्री., **हस्तिशुण्डी** ( र. ११.९१ ) इंद्रावारुणी, कवंडळी.

**इयत्ता**–स्त्री., **मर्यादा, परिमाणम्** ( असंसू. ३४.३ )
सीमा, मर्यादा, परिणाम, सीमा, टप्पा, इतकेपणा, अभ्यासाच्या प्रमाणावर ठरविलेला वर्ग.

**इरा**–स्त्री., **सुरा, मद्यविशेषः** ( ध. ६.२५५ ) सुरा, एक प्रकारचे मद्य.

**–वती**–स्त्री., **वटपत्री** ( रा. ५.२११ ) वटपत्री.

**इरिमेद**–पु., **वनस्पति० खदिरभेदः अरीमेदः विट्खदिरः, गुणाः–कषायस्तिक्तः, शीतः** ( ध. ) **उष्णः ( रा. ) रक्तस्तम्भनः, आमस्तम्भनो, मुखरोगहरो, भूतविनाशकः, शोफातिसारकासघ्नो, विषवीसर्पनाशनश्च** ( ध. ५.१३३ )
N. O.—MIMOSACEAE
L.—ACASIA FARNESIANA
ENG.—CASSIA FLOWER
हिं.—दुर्गंधि खैर.
म.—शेण्याखैर, गंधिया हिवर, घाणेरा खैर.
गु.—गंधिलो खेर; इरिमेद.
बं.—गुयेबाब्ला विट्खयेर.
त.—PIKKARUVIL पिक्कारुविल.
**खैराचा एक प्रकार**—गुण–तुरट, कडु, थंड, रक्तस्तंभक, आमस्तंभक, तोंडाचे रोग, भूतबाधा, सूज, अतिसार, खोकला, विष, धावरेनाशक.

**इरिवेल्लि**–स्त्री., **रोग० क्षुद्ररोग० त्रिदोषजा सर्वदोषलक्षणयुता शिरोगता वृत्ता उग्ररुजा सज्वरा पिडका** ( सुचि. २०.७–८ )
डोक्यात होणारी वाटोळी अतिवेदना व ज्वरयुक्त त्रिदोषात्मक पुळी.

**इरिवेल्लिका**–स्त्री., **इरिवेल्ली** ( सुनि. १३.१५ )
या नावाची एक पुळी–तिन्ही दोषाने होते. डोक्यात होते; पीडा त्रासदायक असते.

**इलि**–पु., **मत्स्यजातीयप्राणि०** ( काखिल. २४.५०.५१ )
एक प्रकारची मासळी. इलिया ( अ ), इलिश, हिलसामछली. इली ही पर्याय नावे.

**इली**–पु., **इलीः** ( काखिल. २४.५०.५१ )
एक प्रकारची मासळी. मासळी. पहा ‘ इलि ’

**इलीष**–पु., **इलिः** ( काखिल. २४.५०.५१ ) पहा ‘इलि’

**इल्य**–न., **इलिः मत्स्यजातीयप्राणि०, इलिः, इली, इलीशश्च अस्य पर्यायाः** ( काखिल. २४.५०-५१ ) पहा ‘इलि’.

**इष**–पु., **आश्विनो मासः** ( सुसू. ६.६ ) आश्विन महिना.

**इषीका**–स्त्री., **काशशलाका, दर्भतूली** ( अहसू. २१.१९ ) दर्भाची काडी, काश, तृण, मोळ.

**इषु**–पु., **शरः** ( ध. ४.१३५ ) बाण, शर, तीर.

**–पुङ्खिका**–स्त्री., **शरपुङ्खा** ( र. ११.५२ ) उन्हाळी.

**इष्ट**–वि., **प्रियं हितं च** ( चचि. १५.१२ )
मनाला आवडणारे व आरोग्याला हितकर.
**प्रियमात्रम्** ( सुसू. ४६.४५९ )
फक्त मनाला आवडणारे.

**–गन्ध**–वि., **यथोक्तप्रमाणगुणैरुपेतम्** ( असंशा.८ ) **मनोहारिगन्धोपेतम्** ( सुउ. ४७.२६ )
सांगितलेल्या प्रमाण व गुणांनी युक्त. मनाला आवडणारा वास अथवा सुगंधयुक्त.

**–संस्कार**–पु., **रुचिकरः पथ्यश्च संस्कारः** ( सुसू. ४६. ४५९ )
रुचकर आणि आरोग्याला हितकर संस्कार.

**इष्टक**–पु., **इष्टः, एरण्डः** ( चचि. १४.४३ ) एरंड.

**इष्टका**–स्त्री., **गृहादिनिर्माणार्थं कृतो दग्धमृत्खण्डः पक्वेष्टिका** ( सुचि. ३२. ५ )

ऊष्मस्वेदार्थम् उद्घर्षणार्थं च इयं प्रयुक्ता भवति ( सुचि. २४.५ ड )
घर इत्यादी बांधण्याकरिता मातीचे लांबट चौकोनी बनविलेले ठोकळे. पक्की वीट. **उपयोग**–अंग घासण्याकरता व विस्तवात तापवून शेकण्यासाठी.

**–पथक**–न., लामज्जकम् ( ध. ३.८६ ) वाळा.

**–स्वेद**–पु., जलाद्यवसिक्तया, आर्द्रालक्तकपरिवेष्टितया वा तप्तेष्टकया कृतः स्वेदः ( सुचि. ३२.५ )
**गुल्मेऽस्यावचारणमुपदिष्टम्** ( सुउ. ४२.५६ )
वीट तापवून तिच्यावर ओला अळिता किंवा पाणी शिंपडून त्याने शेकणे, वाफारा घेणे. गुल्म विकारात उपयुक्त.

**इष्टि**–स्त्री., यज्ञः ( चचि. ८.१८९ ) यज्ञ.

**इष्टिका**–स्त्री., इष्टका ( सुचि. २४.५६ ) पहा 'इष्टका'

**–यन्त्र**–न., **गन्धकजारणार्थं यन्त्र० भूमौ वर्तुलं गर्तं विधाय मल्लं गम्भीरोदरं क्षुद्रं मृण्मयं पात्रं तद्गर्तमध्ये संस्थाप्य तत्रैकामिष्टिकां मध्यगर्तवर्तीं च निधाय इष्टिकागतगर्तं परितोऽङ्गुलोच्छ्रायमालवालं विधाय तद्गर्ते पारदं क्षिप्त्वा तद्गर्तमुखे वस्त्रं प्रसार्य तच्च दृढं बध्वा तदुपरि समभागं गन्धकं दत्वा न्युब्जमल्लेन गर्तमुखं रुद्ध्वा मल्लपालिमध्यभागं मृदा सम्यक् रुद्ध्वोपरि वन्योपलैः कपोतपुटं पुनः पुनर्देयम् । इष्टिकया पारदस्य यन्त्रणात् एतद्यन्त्रमिष्टिकायन्त्रनाम्ना कथितम् । तेन निर्धूमगन्धकजारणं कार्यम्** । ( र. ९.५२ तः ५५ )
वीट यंत्र. विटेला खोल खांच करून त्या खांचेभोवती एक अंगुळ उंचीचे आळे ( मातीचे ) करावे. खांचेत पारा घालावा व तोंडावर फडके आंथरावे व पक्के बांधावे. त्यावर समभाग गंधक पसरावा. नंतर वर एक खापराची किंवा लोखंडाची वाटी झाकावी व मातीने संधिलेप करावा. वर आठ रानशेण्या ठेवून पेटवाव्या. असे पुनःपुन्हां गंधक पाऱ्यामध्ये जिरेपर्यंत पुट द्यावे. हे यंत्र जमिनीत गोल खड्डा करून खोल डेऱ्याच्या मातीच्या परळात ठेवावे.

**इष्वास**–पु., **इषुमोक्षकः, बाणमोक्षकः** (चवि. ८.४२)
बाण सोडणारा योद्धा.

## ई

**ईक्षण**–न., दर्शनम् ( अहसू. २४.१ )
पहाणे, दर्शन घेणे, डोळा, दृष्टि, नजर.

**ईक्षणाञ्जन**–न., **नेत्राञ्जनम्, अञ्जनम्** ( सुउ.३९.२६३ )
डोळ्यात घालावयाचे अंजन, काजळ.

**ईक्षित**–न., **दृष्टिः दर्शनम्** ( असंशा. ८.३२ )
दृष्टि, दर्शन, पहाणे, दृष्ट लागणे.

**ईति**–स्त्री., **उपद्रव० रोगादिदुर्दैवम्** ( सुसू. ५.३२ )
**ईतयः–अन्नादिक्षयहेतवोऽतिवृष्ट्यादयः**
**अतिवृष्टिरनावृष्टिर्मूषकाः शलभाः खगाः ।**
**स्वचक्रं परचक्रं च सप्तैता ईतयः स्मृताः ॥**
( सुसू. ५.३२ ड )

**अतिवृष्टिरनावृष्टिर्मूषकाः शलभाः शुकाः ।**
**अत्यासन्नाश्च राजानः षडैता ईतयः स्मृताः ॥**
( कामन्दकीय–रघु० १.६३ मल्लिनाथ० नीतिसारः १३.६३ )
**अतिवृष्टिरनावृष्टिः शलभा मूषकाः शुकाः ।**
**असत्करश्च दण्डश्च परचक्राणि तस्कराः ॥**
रोग इत्यादि दुर्दैव. त्रासदायक व्यथा. रोगात होणारे उपद्रव–अतिवृष्टि, अनावृष्टि–पाऊस न पडणे, उंदीर टोळ, पक्षी ( पोपट ) स्वताच्या राजसत्तेचे, परसत्तेचे आक्रमण, अयोग्य कर, शिक्षा, चोर या 'ईति' होत. ह्या ७ ईति अन्नादींचा क्षय करणाऱ्या होत.

**ईप्सित**–वि., **इष्टम्, अपेक्षितम्** ( सुचि. ३४.५ )
इच्छित; इष्ट; अपेक्षित; हवे असलेले.

**ईप्सु**–वि., **इच्छुकः, अभिलाषी** ( सुउ. ६०.१२ )
इच्छा करणारा, इच्छुक, अभिलाषी, इच्छिणारा.

**ईरण**–पु., वातदोषः (सुचि. २४.१०८; अहसू. १५.१२)
वायुदोष.

**ईरिण**–न., **ऊषरं क्षेत्रम्** ( सुक. ३.१० )
नापीक जमीन, ओसाड प्रदेश, खारी जमीन.

**ईरित**–वि., **प्रेरितः** ( चनि. ८.४ ) प्रेरणा केलेला.
**विलायितः** ( चसू. ६.२२ )
विरघळलेला, पाघळलेला.

**ईर्ष्यक**–पु., **दृग्योनिः, सरेतस्क-षण्ढपुरुषः; दृष्ट्वा व्यवायमन्येषां व्यवाये यः प्रवर्तते । ईर्ष्यकः स च विज्ञेयः** । ( सुशा. २.४१ ) **ईर्ष्यारतिः इत्यस्य चरकवाग्भटोक्तपर्यायः**
शुक्र असलेला षंढ, दुसऱ्या स्त्रीपुरुषांचा संभोग पाहून जो संभोगाला प्रवृत्त होऊ शकतो तो. ईर्ष्यारति हे याचे चरक व वाग्भटोक्त दुसरे नाव.

**ईर्ष्या**–स्त्री., **मनोविकार० परसंपत्तावसहिष्णुता** ( सुसू. १.२५ ( ३ )
दुसऱ्याच्या संपत्तीबद्दल असहिष्णुता, मत्सर, ईर्षा.

दुसऱ्याच्या उत्कर्षाबद्दल, गुणांबद्दल मत्सर, ते न पाहवणे, सहन न होणे.
**समाने द्रव्ये परसंबंधप्रतिषेधेच्छा** ( चसू. ७.२७ )
दुसऱ्या इतकीच आपली सांपत्तिक स्थिति असतानाही त्याचा मत्सर.

**–रति**–पु., **ईर्ष्यकः षण्ढः** (चशा. २.२०; असंशा. २)
**ईर्ष्यकः दृग्योनिषण्ढः**
पहा 'इर्ष्यक'.

**ईर्ष्यालु**–पु., **नपुंसक, ईर्ष्यकः** ( असंशा. २.४५ )
पहा 'ईर्ष्यक' दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न होणे.

**ईर्ष्यु**–वि., **ईर्ष्यायुक्तः** ( चशा. ८.२१ )
ईर्षा करणारा; असहिष्णु; मत्सरी.

**ईशकोण**–पु., **ऐशानी दिक्; रसशालाया ईशकोणके सिद्धवस्तूनां स्थापनं प्रकुर्यात्** । ( र. ७.४ )
ईशान्यदिशा. पूर्व व उत्तर या दोन दिशांमधील कोनांतील दिशा. या दिशांच्या कोपऱ्यात सिद्ध औषधिद्रव्ये ठेवावी.

**ईशान**–पु., **महेश्वरः** ( सुचि. २९.१३ )
महादेव, महेश, शंकर.

**ईशानी**–स्त्री., **शमी** ( ध. ५.९५ )
शमी, शमीचे झाड.

**ईश्वर**–पु., **सृष्टिकारणम्, परमात्मा** ( सुशा. १.११ )
देव, परमेश्वर, सृष्टिकर्ता, सृष्टीचा कारण.
**रुद्रः अहङ्कारस्याऽधिदैवतम्** । ( सुशा. १.७ )
रुद्र. अहंकार या तत्वाचे–गुणाचे अधिदैवत.
**धनाढ्याः विशेषेण सुकुमाराश्च । ईश्वरा हि प्रायेण सुकुमाराः स्निग्धाश्च भवन्ति ।**
( चक्रपाणि, चक्र. ७.२५ )
धनाढ्य, श्रीमंत आणि सुकुमार, म्हणजे कोमल व सत्ताधारी लोक बहुधा स्निग्ध प्रकृतीचे व सुकुमार असतात.

**( ईश्वरा )**–स्त्री., **वन्ध्यकर्कोटकी** ( असंउ. ४२ )
वांझकर्टोली. मुंगुसवेल, शिवलिंगी, नागदवणी.

**( ईश्वरी )**–स्त्री., **वन्ध्यकर्कोटकी**
( र. २९.३४ रा. ३.२७३ ) पहा 'ईश्वरा'.
**रुद्रजटा** ( रापरि. ३.२४ )
ईश्वरमूल, रुद्रजटा. तीन चार हात उंच एक क्षुप.
**नाकुली** ( रा. ७. १५२ )
नाकुली ईश्वरमूल, एक प्रकारचा रास्ना, मुंगुसवेल.
**लिङ्गिनी** ( रापरि. ३.१६ )
लिंगिनी, शिवलिंगी.

**ईषिका**–स्त्री., **शरिका** ( चसि. २.२२ )
शर, बाण, दर्भप्रकार.

**ईह**–क्रि., **चेष्टायाम्** ( सुउ. ३९.३२१ )
हालचाल करणे, हालचाल. इच्छा करणे.

**ईहा**–स्त्री., **चर्या, चेष्टा, वाञ्छा** ( अहसू. १.३६ ) ( सुशा. ४.४९ ) हालचाल; इच्छा.

**ईहित**–न., **चेष्टितम्; कायिकं कर्म**
( अहसू. ११.१५ ) केलेले कृत्य. शारीर कर्म.

## उ

**उ**–पु., **शिवः, धत्तुरो धात्री वा**
( र. २०.२२२ ) ( शब्दस्तोमः )
महादेव, धोतरा, आवळकाठी.

**उखर**–न., **खनिजलवणम्** ( ध. २.३२ )
खाणीतील द्रव्य, मीठ.

**उखल**–पु., **तृण० भूरिपत्र० बलदो रुच्यः पशुभ्यः सर्वदा हितः** ( रापरि. ८. ४६ )
एक गवत. पुष्कळ पानांचे. गुण–बलदायक, रुचकर, पशूंना नेहमी हितकर.

**उखा**– स्त्री., **शारीर० कक्षशिरःपार्श्वयोर्निम्नभागः**
( चशा. ७.११ )
काख, बगल, जांघेजवळचा भाग.

**–पात्र–स्थाली** ( सुउ. ४४.३४ )
थाळी, तपेली, पातेली, शेगडी, डेग.

**उग्र**–( परिव ) वि., **तीव्रम्, तीक्ष्णम्, सक्रोधम् अत्यन्तमसहनीयम्** ( चइ. १२.६८ )
तीव्र, तीक्ष्ण, रागाने युक्त. सहन करण्यास अशक्य, रागीट.
न., **वनस्पति० वत्सनाभः** ( ध. ७.१२८ )
बचनाग.

**( उग्रा )**–स्त्री., **वनस्पति० वचा** ( सुउ. ५१.२७ )
**मेथिका** ( ध. ६.१११ ) वेखंड, मेथी.
**यवानी** ( रा. ६.१४१ ) ओवा.

**–कर्मन्**–वि., **मारणादिदुष्कार्यप्रवृत्तः**
( चइ. १२.१७ )
वध करणारा; क्रूर कर्मे करणारा.

**–काण्ड**–पु., **वनस्पति०–काण्डीरः** ( ध. ४.६२ )
कांडरी, कांडीर, करेला.

**–गन्ध**–पु., **वनस्पति० कुठेरकः** ( रा. १०.८४ )
कुठेरक, लहान तुळस.
पु., **रसोनः** ( रा ७.९४ ) लसूण.
न., **निर्यास० हिङ्गुः** ( रा. ६.५९ ) हिंग.
**वनस्पति०**–पु., **कट्फलम्** (रापरि. ८.१०) कायफळ.

—( गन्धा )—स्त्री., वनस्पति० वचा ( सुउ. ५०.५३ ) वेखंड.

**अजगन्धा; ब्राह्मी** ( रा. ४.१५३ )
तिळवण, ब्राह्मी, कानफोडी.

**यवानी** ( ध. २.९१ ) ओंवा.

**—गन्धिका**—स्त्री., वनस्पति० अजमोदा ( रा. ६.१५१ )
अजमोदा, ओंवा.

**—रेवती**—ग्रह० सा प्रजां हन्ति, ' ब्रह्मस्वहारिणां लोके विषमाणां दुरात्मनाम्। तस्कराणां शठानां च प्रजां हन्त्युग्ररेवती ' ॥ ( का. रेवतीकल्प. १७ )
एक बालग्रह. गरीब ब्राह्मणाचे द्रव्य हरण करणारे, वाकड्या मार्गाचा अवलंब करणारे; दुष्टबुद्धि, चोर, लुच्चे यांच्या प्रजेचा हा रेवतीग्रह नाश करतो.

**—वीर्य**—पु., न., निर्यास० हिङ्गुः ( रा. ६.५९ ) हिंग.

**—शब्द**—पु., हस्तेन ताडिते उदरे आनाहवत् जायमान उच्चैर्नादः ( सुनि. ७.९ )
बोटांनी पोटावर ठोकले असता फुगल्यासारखा होणारा डब्ब आवाज.

वि., **उत्कटशक्तियुक्तम्** ( सुक. २.१८ ) अतिबलवान.

**उचित**—वि., **अभ्यस्तम्** ( चसू. ६.४१ )
ज्याचा अभ्यास केला आहे तो. अनुकूलसवयीचा.

**उच्चटक**—पु., वनस्पति० **उच्चटा** ( चसि. १२.१८—७ )
उत्कटारी.

**उच्चटा**—स्त्री., वनस्पति० घुर्घुराख्यशणघण्टकारफलोऽल्पो विटपः, सरयूपकण्ठे वारेन्द्र्यां च प्रायशः उपलभ्यते ( सुचि. ३८.८४ )
घुरघुर नावाची लव्हाळ्याच्या जातीची वनस्पती. हिची फळे शणपुष्पीच्या आकाराची असतात. ही शरयूनदीच्या तीरी व बंगालातील वारेंद्र प्रांतात होते.

**तामलकी** ( रा. ५.१४४ ) भुईआवळी.

**उच्चतरु**—पु., वनस्पति० **नारिकेलः** ( रा. ११.१०४ )
नारळ, माड.

**उच्चय**—पु., **समूहः** ( र. २.५ )
समुदाय, संग्रह, रास, ढीग.

**उच्चीयन्ते संगृह्यन्ते विक्षिप्ताः पदार्था अनेनेत्युच्चयः राशीकृत्य स्थापनम्** ( अहसू. १.४ )
विखुरलेले पदार्थ ज्याने गोळा करून ठेवले जातात तो, ढीग करणे.

**उच्चाटा**—स्त्री., वनस्पति० **नागरमुस्ता** ( रा. ६.६२ )
नागरमोथा.

**उच्चार**—पु., **विष्ठा** ( सुचि. २४.९८ ) मळ; पुरीष, विष्ठा.

**शब्दोच्चारः** ( चशा. ८.५२ ) शब्द उच्चारणे.

**—शायिन्**—( परिव० वि०, ) **उच्चारं घुर्घुरकादिं कृत्वा शेते इति** ( चशा. ८.५२ )
झोपेत घुर्घुर करणारा, घोरणारा.

**उच्चिटिङ्ग**—पु.. कीट० **वायव्यः** ( असंउ. ४३ )
चावला असता वातप्रकोप करणारा किडा.

**वृश्चिकभेदः तनुदीर्घश्च** ( असंउ. ४३ )
विंचवाचा प्रकार. लहान व लांबट आकाराचा.

**शुकतुण्डविषः कीटः** ( सुक. ३.५ ) एक किडा.

**उच्चिटिङ्गदष्टलक्षणानि चास्य वृश्चिकदंशवद्भवन्ति** ( चचि. २२.१५३ )
खेकडा. खेकडा चावल्याने विंचवासारख्या वेदना होतात.

**उच्चैर्भाष्य**—( न., ) **उच्चस्वरेण भाषणम्** ( चसि. १२.११ ) उंच आवाजाने बोलणे.

**उच्चैःश्रवस्**—( पु., ) **अमृतमन्थनोत्पन्नस्तुरगः, शक्रवाहनभूतः** ( सुचि. १५.६ )
अमृतमंथनाच्या वेळी उत्पन्न झालेला एक घोडा. इंद्राचे वाहन.

**उच्चैःश्रुति**—( स्त्री., ) **तारस्वरमात्रश्रवणम् अल्पशब्दस्य तु सर्वथैव अश्रवणम्** ( चसू. २०.११ )
मोठ्याने बोलले तरच ऐकावयास येणे. हळू बोललेले मुळींच ऐकावयास न येणे.

**उच्छादन**—( न., ) **गन्धद्रव्येण शरीरमार्जनम्, उत्सादनम्, उद्वर्तनम्** ( असंचि. ९ )
सुगंधी द्रव्यांनी शरीर चोळणे. उटणे लावणे.

**उच्छिङ्घन**—( परिव. न., ) **उच्छ्वासेन वायोरन्तर्नयनम्** ( असंउ. २४ ) उच्छ्वासाने वायु आत घेणे

**उच्छिङ्घन**—( न., ) लक्षण० **छिक्का** ( सुउ. १७.६४ )
शिंक, एक लक्षण.

**नासिकया वायोरन्तःप्रवेशनम्, नेत्रे विलम्बिन्युच्छिङ्घनं कार्यम्** ( सुउ. १९.८ )
जेव्हा नेत्रविकारात डोळे खूपच बाहेर आल्यासारखे होतात तेव्हा नाकाने वायूचा आत प्रवेश होणे.

**उच्छिन्दन**—( न., ) लक्षण० **क्षुत्** ( असंसू. २९.१६ )
शिंक.

**उच्छिष्ट**—( न., ) **आचमनोदकम्** ( सुउ. ३२.९ )
**आचम्योर्वरितं पात्रस्थं यदुदकं तत्**
( वि., ) **परभुक्तावशिष्टम्** ( अहउ. ४.३० )
पाणी प्याल्यावर उरलेले पाणी. दुसऱ्याने खाल्यानंतर शिल्लक राहिलेले अन्न, उच्छिष्ट; उष्टे.

**उच्छीर्षक**–वि., **उच्छ्रितशिरस्कम्** ( सुचि. ३६.२३ )
डोके उंच केलेला.
न., **शय्यायाश्शिरोभागः** ( असंउ. १ )
शय्येचा–शेजेचा–अंथरुणाचा डोक्याकडचा भाग, उशाचा भाग.

**उच्छून**–वि., लक्षण० **उन्नतशोफयुक्तम्** ( असंसू. ४०.५ )
वर उचलून आलेली सूज. व्रणाचे पूर्वरूप.

**उच्छ्रय**–पु., **संबन्धः आधिक्यम्** ( सुउ. ३८.१४ )
संबंध, आधिक्य.

**उच्छ्राय**–पु., **आधिक्यम्, उन्नतत्वम्** ( सुचि. ३४.१९ )
अधिकता, उंचाई, वर उचललेला वर उठून आलेला भाग, उंचावलेला.
**दीर्घत्वम्** ( सुसू. ३५.१२ ) दीर्घता–लांबी.

**उच्छ्रित**–वि., लक्षण० **उत्सेधम्** ( सुसू. १२.१० )
वर उचलून आलेला भाग. उंचावलेला.

**उच्छ्रिताक्ष**–वि., **उच्छूनाक्षम्** ( चवि. १७.६१ )
वर आलेल्या डोळ्याचा. सुजीर डोळ्याचा.

**उच्छ्रिति**–स्त्री., **उच्छ्रयः, संबन्धः, आधिक्यम्** ( सुउ. ३८.१७ ) अधिक संबंध, अधिकता.

**उच्छ्वास**–पु., लक्षण० **श्वासागमः** ( सुशा. २.५५ )
श्वास आत घेणे.

**उच्छ्वासारोधक**–वि., लक्षण० **उच्छ्वासस्य आसमन्ताद् रोधकः** ( सुउ. ४२.१३२ )
**श्वासागमस्य आसमन्ताद् रोधकः**
श्वास आत घेण्याला सर्व बाजूंनी अवरोध करणारा. श्वासाला अडचण करणारा.

**उच्छ्वासावरोध**–पु., **श्वासनिर्गमावरोधः**
बाहेर सोडावयाच्या श्वासाला अवरोध, अडणे.
**–वस्ति**–पु., **वायोर्निष्कासनं कृत्वा गृहीतो बस्तिः** ( चसि. ५.९ ) हवा बाहेर काढून घेतलेला बस्ति.

**उच्छ्वासावरोधन**–न., लक्षण० **श्वासग्रहणस्य अवरोधः** ( सुनि. ९.२१ )
एक लक्षण; श्वास आत घेण्याला अडचण वाटणे.

**उच्छ्वासोपरोध**–पु., लक्षण० **उच्छ्वासे कृच्छ्रत्वम् श्वासागमस्य अवरोधः** ( असंसू. २९.१६ )
श्वास आत घेण्यास कष्ट वाटणे, अडचण वाटणे. अवरोध होणे.

**उज्जृम्भण**–न., लक्षण० **जृम्भायाः प्रवृत्तिः** ( र. १२.९ ) जांभई.

**उज्ज्वल**–पु., षष्टिक० **कुधान्यभेदः** ( चसू. २७.१४ )
आंबेमोहोर, साठे तांदुळाचा एक प्रकार. हलके धान्य.
पु., **शृङ्गाररसः** ( अहृसू. २.३१ ) प्रेमरस.
वि., **शोभनः** ( अहृसू. ३.४१ ) सुशोभित, सुंदर.
न., **सुवर्णम्** ( रा. १३.१ ) सोने.

**उज्ज्वाल**–पु., कुधान्य० उज्ज्वल ( अहृसू. ६.९ )
पहा ' उज्ज्वल '.

**उटज**–पु., न., **पर्णशाला** ( असंचि. ७ )
पर्णकुटी. पानांनी आच्छादलेली झोपडी.

**उटिका**–स्त्री., **उडुकम्, उडुः=नक्षत्रम् उडुकशब्दः सप्तविंशतिसंख्यार्थे** ( र. २०.२२२ )
नक्षत्र. सत्तावीस या संख्येचा वाचक शब्द.

**उडुप**–पु., न., **पिधानम्** ( चवि. ७.२३ )
आच्छादन, झांकण.

**उडुपति**–पु., सोम० ( सुचि. २९.८ )
सोम नावाच्या चोवीस औषधांपैकी एक औषध.

**उडुम्बर**–पु., **उदुम्बरः** ( सुचि. २६.२९ ) उंबर.

**उण्डुक**–पु., शरीर० **पोट्टलकः** ( सुशा. ४.२५ )
**पक्वाशयैकदेशे विभक्तमलाधारः उण्डुकः अत उण्डुकात् पक्वाशयो भिन्नः** ( सुशा. ५.७ )
**शोणितकिट्टप्रभवः उण्डुकः** ( सुशा. ४.२५ )
**चरके पुरीषाधारशब्देन उण्डुकः प्रतिपादितः** ( सुशा. ड. ४.१७; )
**उण्डुकस्थं मलं मलधरा कला विभजते** ( सुशा. ४.१७ )
पक्वाशयाच्या वरचा मोठ्या आतड्याचा भाग. पक्वाशयाला लागूनच पण वेगळा असा मलाचा आधारभूत भाग. रक्ताच्या किट्टापासून उत्पत्ति. मल-धराकला ह्याच उंडुकातील मलाचे विभजन करते.

**उत्कट**–न., वनस्पति० **त्वक्** ( ध. ३.५० ) दालचिनी.
पु., **रक्तेक्षुः** ( अहृसू. १५.२४ ) लाल उंस.
**धान्य० शालि० कषायमधुरलघ्वादिगुणः** ( चसू. २७.१८ ) साळ. शालीवर्गातील एक तांदूळ. तुरट. लघु, मधुर इ० गुण.
**शरः** ( ध. ४.१३५ )
शर, बाण, कुसळे असणारे गवत.

**उत्कटक**–पु., आसन० ( असंसू. २८ )
दोन पायांवर बसणे. उकिडवे बसणे. पहा ' उत्कटासन. '

**( उत्कटा )**–स्त्री., वनस्पति० **सैंहली पिप्पली** ( रा. ६.११९ ) सिंहलद्वीप–लंकेतील पिंपळी.

**उत्कटासन**—न., शरीरसंस्थिति० गुदपार्ष्णिसमायोगः सुशा. ३.१६; ( सुनि. २.४ )
गुडघ्यावर बसणे. उकिडवे बसणे. जमिनीला ढुंगण न टेकता, गुडघे मिटून दोन पायांवर बसणे.

**उत्कर**—पु., अवकरः ( असंसू. ६ )
समूह ( सुसू. ४५.९ )
केर. केरकचरा. झुबका. ढीग. समूह.

**उत्कर्तन**—न., छेदः, ऊर्ध्वस्य कस्यचिदङ्गस्य कर्तरीशस्त्रेण छेदनम् ( सुक. ८.१३० )
कातरणे, ऊर्ध्व भागातील एखाद्या अवयवाला कातरीने कापणे, कातरीने तुकडा पाडणे.

**उत्कर्ष**—पु., समृद्धिः, आधिक्यम् ( सुसू. ४१.३ )
उत्कर्ष, समृद्धि. श्रेष्ठता. वरच्या वरच्या पायरीवर जाणे.

**उत्कर्षण**—न., अधोगतस्योर्ध्वकर्षणम् ( सुसि. १.३ )
खाली पडलेल्याला वर काढणे, वर ओढणे.

**उत्कार**—पु., लक्षण० उद्गारः ( सुसू. ३१.१६ ) ढेकर.

**उत्कारिका**—स्त्री., भक्ष्यवस्तु० पूपलिका ( अहसू. ८. ४५ )
'पोलिका' इति लोके ( चचि. १७.८३ )
पोळी, चपाती, घारगा, पुरी. हारोळी, गाकर, पोटीस.
लप्सिका ( सुचि. २६.१७ )
लापशी, पुरी, हारोळी, भाकरी.
रोटिका ( सुचि. १.८ ) पोटीस, पिंडस्वेदनाकरिता.
संयावप्रकारः ( सुचि. १०.५ ) शिरा;
उत्कारिकाशब्देन तत्साध्यः स्वेदो विवक्षितः षष्टयुपक्रमेष्वन्यतम उपक्रमः ( सुचि. १.८ )
पोटीस. पिंडस्वेद देण्याकरिता व्रणाच्या साठ उपचारांपैकी एक.
**–कल्प**—पु., उत्कारिकायाः पाककल्पः ( चक. १.२३ )
हारोळी, पोटीस तयार करण्याचा प्रकार.

**उत्कारी**—स्त्री., उत्कारिका ( असंचि. ५ )
पहा 'उत्कारिका'

**उत्काशन**—न., उच्चैर्घोषेणाज्ञापनम् ( असंसू. ३६ )
मोठ्याने ओरडून आज्ञा करणे, मोठ्याने खाकरणे, खोकणे.

**उत्कासन**—न., रोग० कासः ( सुसू. २२.८ ) खोकला.
उत्कृष्टं कासनम् ( सुसू. २७.५ )
जोराने खोकलणे. खोकणे.

**उत्कुञ्चा**—स्त्री., भक्ष्यवस्तु० उत्कारिकाः ( चचि. १५.२२७ )
तिलवातामादीनां दृषदि पिष्टानां उष्णोदकमृदितपिंडा उत्कुञ्चा उच्यन्ते.
तीळ, बदाम इत्यादी फळांचा स्नेहयुक्त मगज ( बिया ) पाट्यावर ऊन पाण्यात वाटून केलेल्या गोळ्याला उत्कुंचा म्हणतात. खाण्याचे पदार्थ पुरी, हारोळी इ०

**उत्कुटुक**—वि., उत्कटकम् ( सुचि. ३८.५ )
उकिडवे. पहा 'उत्कटासन'.
उत्कुटुकासन, उत्कटिकस्य चिरासनस्थितिः; ( सुचि. ६.२२ ) पहा 'उत्कटासन'.

**उत्कुपितचक्षुस्**—वि., उक्षण० अभिष्यन्नं चक्षुः, अभिष्यन्दाख्योऽक्षिरोगः ( अहसू. २.७ )
डोळे आलेला. आलेला डोळा. अभिष्यन्द नांवाचा डोळ्याचा रोग.

**उत्कोठ**—पु., रोग० त्वचि रागवदतिकण्डूमन्मण्डलम् ( असंउ. ३६ )
त्वचेवर लाली व अति खाजयुक्त असलेले मंडल, चकंदळ.

**उत्क्रम**—पु., यथानिर्दिष्टक्रमाद्विपरीतः क्रमः ( अहसू. ११.२९ ) ठरलेल्या क्रमाच्या उलट क्रम.

**उत्कुञ्चा**—स्त्री., भक्ष्य० तिलमाषादीनां दृषदि पिष्टानामुष्णोदकमृदिताः पिण्डा उत्कारिका वा
पहा 'उत्कुञ्चा' ( चचि. १५.२२७ )

**उत्क्रुष्ट**—न., संत्रस्तरुतम् ( चइ. १२.२६ )
आक्रोश, चित्कार. मोठ्याने दुःखावेगाने रडण्याचा आवाज, आकांत, ओरडून रडण्याचा आवाज.
**उत्क्रोश**—पु., जलचरपक्षि० कुररभेदः, मत्स्याशी ( सुसू. ४६.१०५ ) मासे खाणारा जलचर पक्षी.
कुरलः, ( च. सू. २७.४३ )
ENG:—KING FIRSHE
पाणकावळा, कुरल, कुरर.
( परिवः ) उच्चैः कूजनम् ( अहसू. ७.१५ )
मोठ्याने कण्हणे.

**उत्क्लिष्ट**—वि., स्वस्थानाद्बहिर्निर्गतः ( सुचि. ३४.५. )
आपल्या ठिकाणातून बाहेर गेलेला; पडलेला.
**–वर्त्मन्**—न., नेत्ररोग० सरक्तेन वातादिदोषत्रयेण यद्वर्त्म उत्क्लिष्टमुत्क्लिष्टं सदकस्मान्म्लानतामेति ( असंउ. ११ )
एक नेत्ररोग. सरक्त तिन्ही दोष पापणी फुगवून विकार करतात तो. पुनः पुनः पापणी फुगते व अकस्मात सुकते असा नेत्रविकार.

**उत्क्लेद्**–पु., **क्लिन्नता मुखस्य शरीरस्य वा** ( र. ५.५३ )
**आर्द्रीभावः** ( सु. सू. ४६.१९ )
मळमळणे, तोंडात गुळण्या येणे, तोंडाला पाणी सुटणे, तोंडाला लाळ सुटणे, शरीर ओलसर होणे.

**उत्क्लेश**–**श्लेष्मनिष्ठीवनम्** ( सुउ. ६१.१६ )
पु., **लक्षण०** ( चसू. १३.५९ )
**अन्तरवस्थितदोषाणामितस्ततः संचलनं न पुनस्तत्प्रवृत्तिः** ( सुउ. ३९.१०१ )
कफ थुंकणे. घशाशी येणे. दोष संचित झालेल्या स्थानातून उचंबळून बाहेर जाऊ इच्छितात पण येत नाहीत असे दिसणे, दोष उचंबळणे.
**क्षोभः, प्रकोपः** ( सुचि. ३४.४ )
दोष वाढणे, क्षुब्ध होणे. प्रकुपित होणे.
**स्वस्थानाच्च्यावनम्** ( चसू. १६.७ )
आपल्या स्थानातून बाहेर जाणे.
**थूत्करणम्** ( डसुउ. ४०.११ ) थुंकणे, थू करणे.
**–जनन**–वि., **थूत्कारप्रवर्तकम्** ( सुसू. ४६.१२८ )
थुंक आणणे, थुंक–लाळ वहाणे; वाढणे.

**उत्क्लेशन**–न., **उत्क्लेश** ( अहसू. १९.६१ )
पहा ' उत्क्लेद '.

**उत्क्लेशनबस्ति**–पु., **दोषोत्क्लेशनार्थमुत्क्लेशौषधयुक्तो बस्तिः** ( सुचि. ३८.९२ )
दोषांचा उत्क्लेश व्हावा, उचंबळून यावे म्हणून द्यावयाचा बस्ति.

**उत्क्लेषक**–पु., **सविषकीट० तद्गुणाः अग्निप्रकृतिकः, पित्तरोगकारी च** ( सु. क. ८.७–१२ )
अग्निप्रकृतीचा व पित्तात्मक रोग करणारा एक किडा.

**उत्क्वथित**–न., वि., **क्वाथः क्वथितम्** ( चसू. २३.१० )
कढवलेले, काढा, उकळलेले; कढण.

**उत्क्षिप्त**–वि., **लक्षण० स्थानादूर्ध्वगतः** (चसि. ५.१०)
स्थानातून वर गेलेला, वर फेकलेला, उडवलेला.
**–त्व**–न., **ऊर्ध्वक्षिप्तत्वम्, भ्रूपक्ष्मप्रभृतीनां स्थानादूर्ध्वगमनम्** ( सुसू. ३२.४ )
वर फेकणे, उडवणे. भुंवई, पापणी नेहमीच्या ठिकाणापेक्षा वर जाणे हे मरणदर्शक ( रिष्ट ) चिन्ह आहे.

**उत्क्षेप**–पु., **अङ्गस्योर्ध्वनयनम्** ( अहसू. ३.३९ )
अंग वर उडवणे, अंग वर नेणे, अंग वर उटवणे, वर फेकणे.
**मयूरपिच्छादिकृतव्यजन०** ( अहसू. ३.३९ )
मोराच्या पिसांचा पंखा.
**शारीरमूर्धगतसिरा०** ( अहशा. ३.३३ )
शारीर अवयव. डोक्याकडे वर जाणाऱ्या शिरा.
**–मर्मन्**–**मर्म० ऊर्ध्वजत्रुगतमर्मणी, स्थानम् शङ्खयोरुपरिकेशान्ते, स्नायुमर्मणी, अर्धाङ्गुले विशल्यप्राणहरे च** ( सुशा. ६.६. सुशा. ६.६–७;२७ )
एक मर्म. दोन्ही बाजूला कानसळीच्या वर हे मर्म आहे. यात शल्य शिरल्यास ते काढले तर मृत्यु येतो म्हणून याला विशल्यप्राणहरमर्म म्हणतात. स्नायु मर्म आहे.

**उत्क्षेपण**–( परिव ) न., **ऊर्ध्वक्षेपणम्** ( सुशा. १०.४६ )
वर फेकणे, उडवणे.

**उत्खात**–वि., **उन्मूलितः** ( सुसू. ६.३३ )
खाच, खळगा, गड्डा.

**उत्तम**–वि., **उत्कृष्टः, धवलः, श्रेष्ठः** ( चसि. ३.५५ )
श्रेष्ठ, उत्कृष्ट, उत्तम, मुख्य, वरच्या दर्जाचे, पहिल्या प्रतीचे.

**( उत्तमा )**–स्त्री., **त्रिफला** ( र. १५.४३ ) त्रिफळा.
**रोग० शूकदोषजन्यपिडका०** ( सुनि. १४.११ )
**गुह्यरोग० रक्तपित्ताभ्यां जाता माषमुद्गनिभा पिटिका** ( असंउ. ३८ )
एक रोग० जननेंद्रिय मोठे करण्याकरिता औषधांचा चुकीने उपयोग केला असता उत्पन्न झालेली पुळी. जननेंद्रियावर रक्तपित्तकोपाने उडीद, मूग यांच्या आकाराची उत्पन्न झालेली पुळी.
**–कण्टिका**–स्त्री., **वनस्पति० कारवेल्लकसमद्वित्रफलगुच्छा सर्वाङ्गदुग्धा वल्ली उत्तमारुणी, सेहुण्डः** ( र. १०.८८–८९ )
कारल्यासारखे दोन तीन फळांचे गुच्छ येणारी दुधाळ वनस्पती. त्रिधारी निवडुंग. उत्तमारणी, सेहुंड.
**–कन्यका**–**वाराहीकन्दः** ( र. १०.८८–८९ )
वाराहीकन्द; डुक्करकंद.
**कुमारी, कन्यका, कुमारी, उत्तमा दुग्धिका** ( र. २०.७५ ) कोरफड; दुधी.
**–कर्णिका**–स्त्री., **वनस्पति० अजशृङ्गी,** ( र. १०.८८–८९ )
असन, साल, अजशृंगी, मेषशृंगी, मेढशिंगी.
**पीतकरवीरः** ( र. १०.८८–८९ ) पिवळी कण्हेर.
**–चन्दन**–पु., न., **धवलचन्दनम्** ( चचि. २०.३२ )
सफेद चंदन, सुखड, पांढरा चंदन.

**–देह**–पु., **मस्तकम्** ( चसि. ३.५५ )
डोके, शिर, मस्तक.

**–धूप**–पु., **पूतनाग्रहरोगे उपयुक्तो धूपकल्पः** ( का. धूपकल्प. १ )
पूतनाग्रह रोगात सांगितलेला उपयुक्त धूपकल्प.

**–मद**–**मदावस्था० तृतीयावस्था, ओजसि विहते विशेषेणात्यर्थं हते उत्तमो मदो भवति** ( चचि. २४.३७ )
दारू प्याल्यानंतर ती चढली असता त्या मदाची–माजाची तिसरी अवस्था. या मदात ओजाचा विशेष नाश होत असल्याने मद तीव्र स्वरूपाचा होतो.

**उत्तमाङ्ग**–न., **शिरो जत्रूर्ध्वभागो वा** ( सुउ. १.९ )
शिर, मस्तक, डोके, खांद्याच्या वरचा शरिराचा भाग.

**उत्तमारणी**–स्त्री., **वनस्पति० उत्तमकरणी** ( सुचि. १०.८ ) उत्तमकरणी नांवाची वनस्पती.
**इन्दीवरी** ( रापरि. ३.२७ )
इन्दीवरी नामक औषधि.
**योधामल्ली गोधामल्ली वा** ( सुचि. ६.१२ )
या नांवाची औषधी.

**उत्तर**–वि., **अधिकः** ( सुसू. ३४.६ )
अधिक. अधिक संख्येचे.
**प्रधानम्** ( सुचि. ३७.८ )
गुण किंवा परिमाण यांमध्ये विशेष. मुख्य किंवा अधिक
न., **पृष्टस्य प्रतिवचनम्** ( चवि. ८.८२ )
उत्तर. विचारलेल्या प्रश्नाचा जबाब.
**साधर्म्योपदिष्टे हेतौ वैधर्म्यवचनं, वैधर्म्योपदिष्टे वा साधर्म्यवचनम्,** ( चवि. ८.३६ )
पहिल्या वक्त्याने साधर्म्य दाखविण्याचे विधान केले की, ते खोडून काढण्याकरिता प्रतिपक्षीय वक्त्याने वैधर्म्य दाखविणारे विधान करणे आणि पहिल्याने वैधर्म्य दाखविणारे विधान केले की, उलट साधर्म्य दाखविणारे विधान दुसऱ्या प्रतिपक्षीय वक्त्याने करणे याला सविपर्यय उत्तर म्हणतात.

**–गुद**–न., **पञ्चदश कोष्ठाङ्गेष्वेकम्, यत्र पुरीषमवतिष्ठते; बृहदन्त्रस्योपान्त्यभागः** ( चशा. ७.१० )
पंधरा कोष्टांगांपैकी एक; ज्यात मळ–विष्ठा असते तो. मोठ्या अंत्राचा शेवटून दुसरा भाग.

**–तन्त्र**–न., **पश्चिमतन्त्रम्, तच्च परिशिष्टरूपम्** ( सुसू. ३.४३ )
सुश्रुतसंहितेचे शेवटचे स्थान. ते परिशिष्टरूप आहे.

**–दन्त**–पु., **ऊर्ध्वपङ्क्तिस्थो दन्तः** ( कासू. २०.६ )
टाळूकडचा दात, वरचा दांत.

**–देहली**–स्त्री., **द्वारशाखयोरुपर्यासक्तं काष्ठम्** ( असंउ. १ )
दरवाज्यातील चौकटीचे वरचे लाकूड.

**–पाद**–पु., **पादपृष्ठम्** ( कासू. २८. )
पायाचा मागचा भाग.

**–बस्ति**–पु., **उपक्रम०** ( चसू. १३.२४ )
**बस्तिप्रकार० उत्तरमार्गेण दीयमानः तथा श्रेष्ठगुणतया वोत्तरबस्तिः** ( चसि. ९.५० चक्र )
**निरूहादुत्तरमुत्तरेण वा मार्गेण दीयते इत्युत्तरबस्तिः** ( असंसू. २८ )

**उत्तरबस्तियन्त्रम्–नाडीयन्त्र०**
**बस्तीचा प्रकार**–उत्तरमार्गात म्हणजे मूत्रमार्ग व जननमार्ग यात द्यावयाचा बस्ति. किंवा ज्याचे गुण उत्तम म्हणजे श्रेष्ठ आहेत तो बस्ति. निरूह ज्या मार्गात–गुदात द्यावयाचा असतो त्याच्या उत्तरमार्गात म्हणजेच मूत्र व जनन ( योनी ) भागात द्यावयाचा बस्ति एक नलिकारूप यंत्र.
**अजाविवराहहरिणगोमहिषान्यतमजं स्नेहमुद्गविमृदितं विगतच्छिद्रशिराग्रन्थिस्कन्दं नातिवर्तुलं मृदु दृढं कषाय–रक्तं सुखसंस्थाप्यौषधप्रमाणं न्युब्जं विवृताननं निवेश्य तस्मिन् कर्णकयोर्दृढेन सूत्रेण घनं समं च बध्वा परिवर्त्य पुनश्चान्यद्बस्तिमुखबन्धनार्थं सूत्रमुपधायाऽनुगुप्तं निधापयेत्** ( असंसू. २८ )
**यंत्र**–शेळी, मेंढी, हरिण, डुक्कर, गाय, म्हैस यांपैकी कोणाचाही मूत्राशय–बस्ति कमवून घ्यावा. कमवण्यासाठी तेल–तूप–लोणी इतर स्नेह अथवा चर्वीने ते खूप मर्दन करून त्यात छिद्र न पडू देता त्यातील शिरांचे जाळे इ. काढून फार गोल नव्हे असे अगदी मऊ व चिवट बनवावे लागते, त्याचा रंग भगवा तांबुस असतो. त्यात योग्य प्रमाणात औषध भरावे व त्याचे तोंड खाली करून त्या पसरट तोंडाच्या दोन्ही बाजू सुताने सारख्या बांधून तोंड उलटवावे व दुसरे तोंड बंद करण्यासाठी आणखी दुसरे सूत्र घालून सुरक्षित ठेवावे.

**उत्तरबस्तिनेत्रम्–द्विविधं. पुरुषाणां स्त्रीणां चैके त्रिविधमाहुः ( बालानाम् अपि )** ( सुसू. ७.१३; ड. )
**नेत्र**–नळी, तोटी ( मूत्रमार्ग गर्भाशय वगैरे इतर

द्वारात घालावयाची ) पुरुष, स्त्री व बालक यांचे करितां तीन प्रकारची.

**उत्तरबस्तिनेत्रप्रमाणम्**– ( १ ) **पुरुषाणाम्–चतुर्दशाङ्गुलप्रमाणं जातीपुष्पवृन्तसदृशाग्रं सर्षपच्छिद्रं सौवर्णराजतादिभवं वा, मध्ये संनिविष्टकर्णिकं मूले द्विकर्णिकं च** ( सुचि. ३७.१००–१०१ )

( २ ) **स्त्रीणाम्–स्त्रीनेत्रं दशाङ्गुलप्रमाणं चतुरङ्गुले संनिविष्टकर्णिकं मुद्गवाहिच्छिद्रं मूत्रस्रोतःपरिणाहं, मूत्रस्रोतःस्थौल्यम्, केचित् स्त्रीनेत्रं मेढ्रायामसममिच्छन्ति अपत्यमार्गे पुरुषेन्द्रियस्थूलनेत्रं किञ्चिदधिकच्छिद्रं च** ( सुचि. ३७.१०३–१०४ )

उत्तरबस्तीच्या नळीचे **प्रमाण–पुरुषांकरिता** १४ अंगुळे लांब, सोन्याचे किंवा चांदीचे बनवलेले जाईच्या फुलाच्या देठासारखे टोक, त्याला छिद्र मोहरीइतके, नेत्रांच्या मुळाशी दोन कान ( चकत्या ) व मध्ये एक कान ( चकती ) असलेले असे असावे. **स्त्रियांकरिता** १० अंगुळे लांब. कान (चकती) चार अंगुळावर, कडा व छिद्र मूग जाईल इतके, मूत्रमार्गाइतक्या घेराचे जाड, पुरुषलिंगा इतके लांब असावे हे एक मत; तर योनीत घालावयाचे नेत्र ( नळी ) पुरुषाच्या इंद्रियापेक्षा किंचित् अधिक स्थूल व छिद्रही पुरुषाच्या इंद्रियाच्या भोकापेक्षा थोडे मोठे असावे. असे दुसरे मत आहे.

**उत्तरबस्तिविधानं मूत्राघाते मूत्रशुक्रार्तवदोषे अश्मरीव्रणे हितम्** ( सुचि. १.११० )

मूत्राघात, मूत्रशुक्र, रज यांचे विकार व अश्मरीव्रणावर उत्तरबस्तीप्रयोग उपयुक्त.

**उत्तरबस्तिविधिः**— ( १ ) **पुरुषाणाम्–अथातुरं स्निग्धस्विन्नं वातमूत्रपुरीषनिर्गमात् प्रशिथिलाशयं सघृतक्षीरां यवागूं पीतवन्तं सावष्टम्भके समं निषण्णम्। उष्णेन तैलेन स्वभ्यक्ते बस्तिमूर्धानं स्तब्धमेहनं पूर्वं शलाकयाऽन्विष्य मूत्रमार्गं ततो बस्तिनेत्रं घृताभ्यक्तं षडङ्गुलानि यावच्छनैः शनैः विदध्यात्। ( केचित् नेत्रस्य प्रणिधानं मेढ्रायामसममिच्छन्ति। ततो बस्तिमवपीडयेन्नेत्रं निर्हरेच्च )**

( २ ) **स्त्रीणाम्–पुरुषबस्तिवत् पूर्वकर्म कृत्वोत्ताना यायूर्ध्वजान्वै स्त्रियै योनिमुखं प्रति सुमृदुपीडितं बस्तिं दद्यात्** ( सुचि. ३७.१०८ )

**स्त्रीणामपत्यपथे मूत्रमार्गे च बस्तिः।**

**विधि**–पुरुषरोग्याला स्नेहन देऊन घाम काढून वातमूत्र व मळ विसर्जन केल्यानंतर मलाशय इ. शिथिल झाल्यामुळे तूप व दूध घातलेली पेज पाजून धैर्याने तक्याशी टेकून सारखे–सम असे बसवून ओटी पोटाला गरम तेल माखून, ताठ धरलेल्या इंद्रियात प्रथम सळई घालून, मार्ग पाहून इंद्रियाच्या लांबीला अनुसरून ( एकमत ) तूप लावलेली वस्तीची नळी हळू हळू आत ६ अंगुळे घालून, वस्ती दाबून औषध आत घालून नंतर काढून घ्यावी.

स्त्रीला सर्व पूर्वकर्म वरील प्रमाणे करून उताणी निजवून गुडघे वर करून योनिमुख थोडे दाबून दोन्ही मार्गात बस्ती द्यावा. असा बस्ती स्त्रीला गर्भाशयमार्ग व मूत्रमार्गात देतात.

**कार्यम्**—**प्रसूतानामप्रसूतानां च प्राप्तगर्भग्रहणकालानां गर्भाशयशोधनार्थमपत्यमार्गे चतुरङ्गुलं निदध्यान्नेत्रम्। मूत्रकृच्छ्रादिविकारेषु तासामुभयरूपाणामपि मूत्रमार्गेऽङ्गुलं निदध्यान्नेत्रम्। कन्यानामप्राप्तद्वादशवर्षाणां मूत्रकृच्छ्रादौ मूत्रवर्त्मन्येकमङ्गुलं निदध्यात्। अंगुलिप्रमाणं तासामेवाङ्गुलिसदृशं ज्ञेयम्।** ( सुचि. २७.१०४–१०५ ड. )

प्रसूत झालेल्या, वात झालेल्या आणि गर्भधारणकालप्राप्त अशा स्त्रियांना गर्भाशयाची शुद्धि करण्याकरिता ४ अंगुले योनीत, २ अंगुळे मूत्रमार्गात, १२ वर्षाच्या आतील मुलींच्या मूत्रमार्गात १ अंगुळ नळी घालावी. अंगुळी म्हणजे स्वतः रोग्याचीच.

**आर्तवकाले स्त्रीणामपावृत्ता योनिर्बस्तिं गृह्णाति किन्तु योनिशूलावत्यये प्राप्ते सत्यनार्तवकालेऽपि योनिमार्गेण बस्तिः दीयते।** ( असंसू. २८.७० )

आर्तवकालात म्हणजे विटाळशेपणी योनिमुख उघडे असल्याने बस्ती गर्भाशयात पोंचतो. पण जर योनिशूल तीव्र असह्य असेल तर आर्तवकाल नसतांही बस्ती दिला जातो.

**स्नेहप्रमाणम्–उत्तरबस्तेः स्नेहद्रव्यप्रमाणं पञ्चविंशं वर्षमारभ्य परमं प्रमाणं प्रकीर्तितं, तत्, सुश्रुतमतानुसारेण प्रकुञ्चप्रमाणं भवति, चरकमतानुसारेण तत्पुनः अर्धपलम्, पंचविंशादधोबुद्ध्यनुसारेण मात्रा प्रयोक्तव्या। सांवत्सरिकबालके स्नेहपलस्य पञ्चविंशतितममंशमारभ्य द्विवात्सरिकादौ प्रतिवत्सरं पञ्चविंशतितमस्यांशस्य वृद्धिं विदध्यात यावत् पञ्चविंशतिवार्षिकस्य पलं स्यात्।**

( सुचि. ३७.१०२ ड. )

**स्नेहप्रमाण**–पंचवीस वर्षांच्यावर ४ तोळे सुश्रुताच्या आणि २ तोळे चरकाच्या मताप्रमाणे. कमी वयात विचाराने. एक वर्षाच्या बालकाला ४।२५ तोळे. वाढत्या वयाच्या मानाने ४।२५ तोळे प्रत्येकवर्षी वाढवावेत.

**स्त्रीणां स्नेहमानम्**–**उत्तरबस्तेः स्नेहस्य परमं प्रमाणं स्वाङ्गुलिमूलसंमितं प्रसृतं वर्तते । अस्याऽर्वाग्बुद्धि-विकल्पितं प्रमाणमुपयोक्तव्यम् । गर्भाशयशोधनार्थं च स्नेहमात्राद्वैगुण्यं च ।**

( सुचि.३७.१०६ ) ( सुचि. ३७.११५ )

स्त्रियांकरिता–८ तोळे स्नेह; गर्भाशय शुद्धीकरिता दुप्पट.

**निरूहोत्तरबस्तिप्रमाणम्**–**१) पुरुषाणाम् उत्तरबस्तेः क्वाथप्रमाणं मात्रायाः बस्तिशोधनार्थं स्वहस्तसंमितं प्रसृतं वर्तते–२ ) स्त्रियाः प्रसूतायाः प्रसूतिरहि-ताया वा गर्भग्रहणयोग्याया गर्भाशयशोधनार्थं द्विप्रसृतं वर्तते–३ ) कन्येतरस्याः ( अप्रसूतायाः प्रसूतायाः वा ) कन्यायाः अप्राप्तद्वादशवर्षीया बस्ति-शोधनार्थं पुरुषवत् स्वहस्तमितं प्रसृतमेव वर्तते**

( सुचि. ३७.११६–११७ )

पुरुषाला उत्तर वस्तीकरता काढा स्वतःच्या हाताच्या पसाभर म्हणजे सुमारे ८ तोळे. व स्त्रीला गर्भा-शयशोधनाकरिता स्वतःच्या हाताच्या २ पसा म्हणजे सुमारे १६ तोळे काढा. १२ वर्षांच्या आतल्या मुलींचा बस्ती शुद्ध करण्याकरिता स्वतःची पसा म्हणजे पुरुषाप्रमाणेच सुमारे ८ तोळे काढा.

**उत्तरबस्तिगुणाः**–**दुष्टं शुक्रशोणितं चाङ्गनानां कष्ट-साध्यं पुष्पोद्रेकं, पुष्पनाशं, मूत्राघातान् मूत्रदोषान्, योनिव्याधिं, अपरायाः निर्गमरोधं, शुक्रोत्सेकं, शर्कराम्, अश्मरीं बस्तिवंक्षणमेहनशूलान् अन्यानपि बस्तिगतान् घोरान् व्याधीन्नाशयति ।**

**गुण**–बस्ति, इंद्रिय, जांघ यातील शूल, मूतखडा, लघ्वीतील रेव, शुक्रस्राव, शुक्रदुष्टि, मूत्राघात, मूत्रदोष, रजोदुष्टि, अतिरजःस्राव, रजोनाश, योनि-रोग, वार न पडणे व इतरही बस्तीरोग यांचा नाश.

**उत्तरबस्तेः सम्यग्दत्तलिङ्गानि व्यापदः क्रमश्च स्नेहबस्तिवदेव** ( सुचि. ३७.१२७ )

स्नेहबस्तीच्या चिन्हांप्रमाणेच क्रम. तसेच बस्ती लागू झाल्याची व उपद्रवाची चिन्हे तशीच.

**स्नेहेऽनागच्छति सति शोधनैर्गणैः संयुक्तां बस्तिं वर्तिं वा विदध्यात्, अथवा बस्तिद्वारमेषणीं प्रवेशयेत्, नाभ्यधः प्रदेशं वा उत्तरमुष्टिना पीडयेत्**

( सुचि. ३७.११७–१८.१९ )

स्नेह आला नाही तर शोधन औषधांचा बस्ती, वात किंवा एषणीयंत्र ( काडी ) आत घालणे व बेंबीच्या खाली ओटीपोट ( मूठ वळून पुढील भागाने ) दावणे.

**–बस्तिकर्मन्**–न., **उत्तरबस्तिविधिः, व्रणस्य षष्ट्युप-क्रमेषूपदिष्टः** ( सुचि. १.८ )

उत्तरबस्ति कसा द्यावा इत्यादी संबंधींचा विधि-व्रणाच्या साठ उपचारांमध्ये सांगितला आहे.

**–बस्तिसिद्धि**–स्त्री., अध्याय० ( चसि. १२.१ )

चरकसंहितेच्या सिद्धिस्थानातील बाराव्या अध्या-याचे नांव.

**–भक्त**–वि., **भैषज्यकाल० भक्तोत्तरम् औषधसेवन-कालः** ( अहसू. १६.२२ )

औषध घेण्याचा काल. जेवण झाल्यावरोबर औषध घेण्याचा काल.

**–भक्तक**–वि., **उत्तरभक्तः** ( असंसू. ५ )

जेवणानंतरचा काळ.

**–मुष्टि**–पु., स्त्री., **मुष्टेरग्रभागः** ( सुचि. ३७.११९ )

मुठीचा पुढचा भाग.

**–वातिक**–वि., **वातप्रधानो विकारो रुग्णो वा**

( चसू. १४.४४ )

वातप्रधान विकार किंवा रुग्ण.

न., **वातप्रधाने विकारे हितं मूलादि**

( चसू. १४.४४ )

**बिल्वोऽग्निमन्थकाश्मरीपाटलाबलाबृहतीशालपर्णी-करमर्दादिद्रव्याण्युत्तरवातिकं विजानीयात्**

( चक्र. चचि. ८.७३ )

वातप्रधान विकारांमध्ये हितकर औषधी मुळे वगैरे द्रव्ये, **वातनाशक मुळे**–बेल, अरणी, शिवण, पाडळ, चिकणा, डोरली, सालवण, करवंद इ.

**–वायु**–पु., **उत्तरो मरुत्, तत्र षड्ऋतुषु मध्ये हेमन्ते उत्तरदिशो जातत्वादुत्तरो वायुर्वहति**

( सुसू. ६.२३.२४ )

उत्तरेचा वायु. उत्तरदिशेकडून दक्षिणेकडे वाहणारा वायु. हेमंत ऋतूत उत्तरेकडून वारा वाहतो म्हणून त्याला उत्तरवायु म्हणतात.

**–वारुणी**–स्त्री., **वनस्पति० उत्तमारणी** ( र. २५.६४ )

उतरण; उत्तमारणी; उतरणी.

**इन्द्रवारुणी** ( र. २५.६४–६६ )

कडूइंद्रावण, इन्द्रवारुणी, कवंडळ, कडू कवंडळ.

**उत्तरक**–न., सरम् । दध्नः उपरितनद्रवांशः (चक. १.१७)
दह्याची मलई, लोणी, सर. दह्यावरचे पाणी, दह्याचा मंड, मस्तु.

**उत्तरण**–न., **विशिष्टेण निर्वापणेन कोमलं विचित्रसंस्कारकरणोचितं च जातं लोहम् बीजापरपर्यायम्** (र. ८.३१)
विशिष्ट धातु पातळ करून त्यात विशिष्ट पद्धतीने अपेक्षित धातु मिश्र केल्यावर ते एकरूप होऊन मिश्रणानुसार रंगाचा धातु नरम होतो. अशा ह्या संस्कारित धातूला उत्तरण म्हणतात, बीज हे त्याचेच नाव.

**उत्तरापथिका**–स्त्री., **वनस्पति० द्राक्षाप्रकारः** (ध. ५.५८) द्राक्षाचा एक प्रकार.

**उत्तरासङ्ग**–पु., **उत्तरीयं वस्त्रम्, संव्यानम्** (चइ. १२.२७ सुसू. ३.५४)
अंगावर घेण्याचे वस्त्र; उपरणे.

**उत्तरीय**–न,, **संव्यानम्, उत्तरासङ्गः** । (र. ४.६१)
पहा 'उत्तरासङ्ग'

**उत्तान**–वि., **देहस्य पृष्ठप्रदेशः धरण्यां निधाय शयानः, ऊर्ध्वमुखः** (अहृसू. १९.४६)
जमिनीला पाठ लावून झोपणारा.

**( उत्ताना )**–स्त्री., **अत्युन्नता योनिः** (चचि. ३०.८२)
नेहमीपेक्षा वर उचलून आलेली योनि.
**–देह**–वि.,**उत्तानशरीरः** (चसि.३.२६)
उताणा निजलेला, उंच शरीराचा, उंच बांध्याचा.
**–पत्रक**–पु., **वनस्पति० रक्तैरण्डः** (ध. १.२९६)
तांबडा एरंड.

**उत्तुण्ड**–( परिव. ) **उन्नतम् वारिबुद्बुदवदुन्नतं शल्यम् दृश्यमुखम्** (अहृसू. २८.२१)
पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणे वर आलेला, ज्याचे तोंड दिसते तो.

**उत्तुण्डकी**–स्त्री., **वनस्पति० करञ्जकः, उत्तुण्डक्यास्तिक्तता तिन्दुकेन सह मधुरायते** (असंसू. ७)
करंज, याचा कडूपणा टेंभुराच्या बरोबर गोड होतो.

**उत्तेजन**–न., **दीपनम्** (असंसू. २५) जठराग्नि प्रदीप्त होणे.

**उत्त्रास**–पु., **लक्षण० भयम्** (असंउ, ३) भय. भीती.

**उत्त्रासन**–न., **खड्गहस्तस्य योधस्य दर्शनादिनाऽऽकुलीकरणम्, एषा चिकित्सोन्मादादिवातरोगे प्रयुज्यते** (अहृसू. १९.४९)
हातात तलवार घेतलेल्या योद्ध्याची भीती दाखविणे, भिवविणे, भयभीत करणे, उन्मादादि रोगांचा एक उपचार.

**उत्थान**–न.,**उद्योगः, पौरुषम्** (चवि. ८.१३.)
उद्योग, पुरुषत्व, पराक्रम.
**क्रियारम्भः** (चवि.४.१०) क्रियेचा–कार्याचा आरंभ.
**उत्पत्तिः, संप्राप्तिः** (सुचि.१.३) (सुचि.९.६८)
उत्पत्ति, उत्पन्न होणे, प्राप्त होणे, संप्राप्ति, उद्भव.
**कारणम्** (सुउ. ३८.३१) हेतु, कारण, रोगकारण.

**उत्थापक**–पु. **यो रुग्णमुत्थापयति सः परिचारकः** (चसू. १५.७) रोग्याला उठवून बसवतो तो. सर्व सेवा करतो तो. परिचारक.

**उत्थापन**–न., **पुष्टिजननम्** (चचि. २८.९६)
पुष्टिकारक, पुष्टि निर्माण करणारे, पौष्टिक.
**मृतस्य भस्मीभूतस्य लोहस्य पुनःस्वरूपापादनम्** (र. ८.४०)
मृत धातूतून पुनः तो धातु निघणे, भस्माला त्याच्या मूळ धातूचे स्वरूप प्राप्त करणे.
**पारदसंस्कार० स्वेदनेन सूर्यतापेन वा मूर्च्छनजन्यदोषाणां विनाशनं कृत्वा पारदस्य चाञ्चल्यतेजस्वित्वगौरवादिकविशिष्टस्वरूपापादनम्** (र. ८.६५)
पाऱ्यावर करावयाच्या आठ संस्कारांपैकी चवथा संस्कार. पाऱ्याचा मूर्च्छनसंस्कार केल्यावर पारा औषधात इतका मिसळून जातो की, तो दिसत नाही. तो पारा उत्थापन संस्काराने वेगळा केला जातो. अग्नीवर दोलायंत्राने स्वेदन करून, कडक उन्हात ठेवून, किंवा डमरुयंत्रातून तो वेगळा करणे याला उत्थापन म्हणतात. मूर्च्छित पाऱ्याला मूर्च्छेतून उठविणे म्हणून उत्थापन हे नाव या संस्काराला आहे. याने पारदाची मूर्च्छा नाहीशी होते. पाऱ्याची चंचलता, तेजस्विता, जडपणा इत्यादी मूळ स्वरूप त्याला प्राप्त होते.

**उत्थापनक**–न., **घटयन्त्रम्** (र. ९.५१)
घटयंत्र नामक एक यंत्र.
**पारदस्योत्थापनकरम्** (र. ९.५१)
पाऱ्याचे उत्थापन करणारे यंत्र.

**उत्थित**–वि., **जातम्** (सुचि. १.१४) उत्पन्न झालेला.

**उत्थितोपतरु**–पु., **वनस्पति० सरलः** (रा. १२.१३६)
सरल, देवदाराचा एक प्रकार.

**उत्पत्ति**–स्त्री., **जननम्** ( असंशा. २ )
जन्म, जन्म देणे, जन्म होणे.

**–कारण**–( परिव., ) न., **वायुः**, **संभवहेतुः**, **भूतानां भावकरो हेतुः** ( सुनि. १.७ )
वायु. उत्पत्तीचा हेतु. महाभूते किंवा प्राणी यांचे व्यक्तीकरण करणारा हेतु.

**–हेतु**–पु., **उत्पत्तेः साक्षात्कारणम्** । ( सुनि. १२.३ )
उत्पत्तीचे साक्षात् कारण.

**उत्पल**–न., **नीलकमलम्** ( सुचि. २८.२३ )
**रक्तं च रात्रिविकासि** ( र. १९.१०२ )
निळे कमळ, लाल कमळ, रात्री फुलणारे कमळ, रात्रविकासी.
**शाक० कषायं रक्तपित्तहरं च** ( चसू. २७.११५ )
एक भाजी. ही भाजी रक्तपित्तनाशक आहे.
**वनस्पति० कुष्टम्** ( ध. ३.४९ ) कोष्ठकोळिंजन.
**नीलोत्पलगुणाः—जलगन्धापनयनार्थमुपयुज्यते** ( सुसू. ४५.१२ )
पाण्याचा दुर्गंध नाहीसा करण्यास उपयुक्त.

**–कन्द**–पु., न., **रक्तोत्पलकन्दः** ( अहृसू. ६.९१ )
**नीलोत्पलस्य कन्दः** ( सुसू. ४६.३०८ )
रक्त किंवा नील कमळाचा कंद.

**–कन्दक**–न., **उत्पलकन्दः** ( अहृसू. ६.९१ )
उत्पल कमळाचा कन्द.

**–किञ्जल्क**–पु., **पद्मकेसरम् सांग्राहिकरक्तपित्तप्रशमनानां श्रेष्ठः** ( चसू. २५.४० )
कमळाचे केशर; हे अतिसार कमी करणारे व रक्तपित्तनाशक औषधात श्रेष्ठ औषध आहे.

**–नाल**–पु., **शाक० कमलनालः**, **शाकमस्य शीतं स्वादुकषायं कफमारुतकोपनं च** ( चसू. २७.११७ )
**अस्य क्षारः सकफे सपिच्छे कण्ठमार्गगे ग्रथिते रक्ते उपयुज्यते** ( असंचि. ३ )
कमळाचा पोकळ देठ, कांडे. ह्याची भाजी थंड, मधुर, तुरट व कफवातप्रकोपक आहे. घशातून गाठाळ रक्तस्राव होत असता याचा क्षार उपयुक्त.

**–पत्र**–न., **शस्त्र० उत्पलपत्रतुल्यं तीक्ष्णधारं षडङ्गुलप्रमाणं छेदनभेदनोपयोगि** ( सुसू. ८.३–४ )
एक शस्त्र. उत्पलपत्राच्या कडेसारख्या तीक्ष्ण धारेचे शस्त्र.

**–भेद्यक**–पु., **कर्णबन्धाकृति० पञ्चदशकर्णबन्धेष्वेकः, वृत्तायतसमोभयपालिरुत्पलभेद्यकः** ( सुसू. १६.१० )
पंधरा कर्णबंधापैकी एक. वाटोळी, लांब व सारखी दोन्ही कानांची पाळी असणे.

**उत्पलक**–न., **शुष्कं छगणम्**, **छाणं**, **गोवरम्** ( र. ५.४३–४४ ) शेणी, गोवरी, रानशेणी.

**उत्पलादिवर्ग**–पु., **उत्पलरक्तोत्पलकुमुदसौगन्धिककुवलयपुण्डरीकाणि मधुकं चेति । तद्गुणाः—दाहपित्तरक्तविनाशनः पिपासाविषहृद्रोगच्छर्दिमूर्च्छाहरः** ( सुसू. ३८.५२–५३ )
उत्पल इत्यादी वनस्पतींचा वर्ग. निळे कमळ, तांबडे कमळ, पांढरे कमळ, सुगंधी कमळ, निळ्या छटेचे पांढरे कमळ, ज्येष्ठमध मिळून हा वर्ग आहे. **गुण–** दाह, पित्त रक्तदोष, तहान, विष, हृद्रोग, वांती, मूर्च्छा नाशक.

**उत्पलिनी**–स्त्री., **वनस्पति० कमलम्** ( रा. १०.२५० )
कमळ, कमळीण.

**उत्पाचित**–वि., **पाकं नीतम्** ( सुचि. ९.२० ) पिकवलेले.

**उत्पाटक**–पु., **कर्णपाल्यां कर्णवेधापयोगेन जायमानः उपद्रवः** ( सुसू. १६.२६ ) [६]
कर्णपालीचा वेध नीट केला नाही तर होणारा एक उपद्रव.

**उत्पाटन**–न., **शल्यतन्त्रे उपक्रम०** ( चसू. ११.५५ )
शल्य चिकित्सेतील एक उपचार. उपटणे, काढणे.
**व्रणवेदना०** ( सुसू. २२.११ )
आतील शल्य उपटून काढण्यासारखी वेदना.
**वाताधिमन्थे लक्षण० नेत्रस्य बहिरूर्ध्वं वा कर्षणवत् पीडा** ( सुउ. ६.१२ )
वातदोषाने डोळे आले आणि त्याची योग्य चिकित्सा झाली नाही तर हा अधिमंथ विकार होतो. त्यात डोळा बाहेर वर उपटल्यासारखी वेदना होते.

**उत्पात**–पु., **कर्णरोग० गुर्वाभरणभाराद्यैः प्रकुपितात् पित्तशोणितात् श्यावादिगुणः स्फोटादिसंयुक्तश्च यः श्वयथुः स उत्पातो नाम रोगः** ( असंउ. २१ )
एक कर्ण रोग. कानात जड अलंकार वगैरे घातल्याने पित्त व रक्त दुष्टींमुळे फोड, काळसरपणा, इत्यादि लक्षणयुक्त सूज ह्या रोगात येते.
**अनिष्टसूचकं निर्घातादि, आगामिभयसूचकं धूमकेतुदुःस्वप्नादिदर्शनं च** ( सुउ. ३९.२६७ )
अनिष्टसूचक शब्द ऐकणे, धूमकेतु दिसणे, वाईट स्वप्ने पडणे.
**नेत्ररोग० सिरोत्पातः** ( सुउ. १.३७ )

**अत्र मञ्जिष्ठादिसिद्धं तैलमुपयोज्यम्**
( सुचि. २५.१६.१७ )
डोळ्याचा एक रोग. रक्तदुष्टीमुळे हा होतो. मंजिष्ठादि तेल यावर उपयुक्त आहे.

**–रोग**–पु., **रोग० पुनःपुनरुपक्रममाणेऽपि अयं शान्तिं नैति** ( काखिल. १५.१४ )
पुन्हा पुन्हा चिकित्सा करूनही शांत न होणारा रोग.

**उत्पिण्डिताक्ष**–वि., **रोगलक्षण० पिण्डीभूते इव अक्षिणी यस्य सः** ( चनि. ८.८ )
दोन्ही डोळे गोळ्यासारखे झाले आहेत असा.

**उत्पिष्ट**–वि., **चूर्णितम्** ( सुसू. ४५. ११२ )
चूर्ण केलेले, पीठ झालेले.
न., **सन्धिमुक्तभग्न० विशेषेणोत्पिष्टे संधावुभयतः शोफो वेदनाप्रादुर्भावो विशेषतश्च नानाप्रकारका वेदना रात्रौ प्रादुर्भवन्ति** ( सुसू. ४२.१०.(२)
सांधा निखळण्याचा एक प्रकार. दोहीकडे नाना प्रकारच्या वेदना व सूज. रात्री वेदना अधिक.

**उत्पीडन**–परिव० –न., **उन्नमनम्** ( सुनि. ६.४ )
वर करणे, उंच करणे.

**उत्पुटक**–पु., **कर्णवेधापयोगेन जायमान उपद्रव०**
( सुसू. १६.२६.( ६ )
कर्णवेध नीट न झाल्याने झालेला एक उपद्रव.

**उत्पुटन**–परिव० न., **लक्षण० दरणम्** ( असंउ. २२ )
एक लक्षण. फाडल्या सारखी, चिरल्या सारखी वेदना.

**उत्पेष**–पु., **हेतु० संध्यस्थिघर्षणम्** ( चवि. ५.१८ )
एक कारण. संधीच्या घटक हाडांचे जोराने घर्षण होणे.

**उत्पेषण**–न., **हेतु० अस्थिपर्वादीनां घर्षणम्** (चसू.१८.४)
कोणताही अवयव हाडे सांधे इ. दगड लाकूड इत्यादी पदार्थांना जोराने घासला जाणे. किंवा अवयवांचे चूर्ण होणे.

**उत्प्लवन**–न., **मण्डुकवदुड्डयनम्** ( र. २.७.८ )
बेडकासारखे उडने, मंडूकाभ्रक अग्नीवर तापवले तर त्याचे पापुद्रे बेडकासारखे उडतात.

**उत्स**–पु., **निम्नादुत्तिष्ठज्जलस्थानम्; उत्सा इति पर्यायः**
( चक्र. चसू. २७.२१४ )
जमिनीतून वर उसळून येणारे पाणी असणारे स्थान. ह्याला उत्सा असा दुसरा शब्द आहे. जलाशय–झरा–स्रोत. तळातला पाण्याचा झरा. झिरपाव.

**उत्सङ्ग**–पु., **अङ्कः** ( सुचि. ६.४ ) मांडी.
**बन्ध०** ( असंसू. ३८.४२ )
पंधरा प्रकारच्या पट्टबंधापैकी एक बंध.
**वर्त्मनोऽधः क्रोडभागः** ( सुउ. ३.९ )
पापणीच्या खाली असलेला मध्यभाग. या भागात उत्संगिनी पीडका होते.
**व्रणवस्तुप्रदेश०, शिखरम्, चिरस्थितपूयावदारणगम्भीरशुषिरव्रणवस्तुप्रदेशः उत्सङ्गतुल्यत्वादुत्सङ्गः**
( सुचि. १.३४ )
व्रण झालेला. वर उचललेला भाग. शिखर; खोल, पोकळ अशा व्रणाचा शिखराच्या ( उत्संगाच्या ) आकाराचा भाग; म्हणून उत्संग.
**पूयस्य सङ्ग उत्सङ्गः** ( सुचि. १२.४ )
पू संचित होतो–पुवाचा संग म्हणून उत्संग.

**( उत्सङ्गा )**–स्त्री., **नेत्ररोग० उत्सङ्गिनी** ( असंउ. ११ )
डोळ्याच्या पापणीच्या मध्यभागात होणारी पुळी.

**उत्सङ्गिन्**–वि., **विंशतिव्रणभेदेष्वेकः, स्थूलपर्यन्तो व्रणाद्बहिः पूयावकाशस्योत्सङ्गवान्**
( चचि. २५.२०–२१ )
वीस प्रकारच्या व्रणांपैकी एक प्रकार. व्रणाच्या बाहेर पू असलेला भाग. व्रणाच्या बाहेर फुगून आल्यासारखा व्रणाचा जाड अर्थात उंच काठ असलेला म्हणजे उत्संगवान् होय.

**उत्सङ्गिनी**–स्त्री., **वर्त्माश्रयनेत्ररोग०** ( सुउ. ३.१० )
**लक्षणम्–रक्तेन रक्ता तत्तुल्यपिटिकाभिराचिता पिटिका** ( असंउ. ११ )
**चिकित्सा–छेदपूर्वकं लेखनं कार्यम्**
( सुउ. १३.१६ )
**सर्वजोत्सङ्गिनी–साध्य नेत्ररोग०** ( सुउ. १.४० )
डोळ्याच्या पापणीचा रोग. रक्तदुष्टीने एक पुळी लाल अशी व तिच्या भोवती तशाच लालपुळ्या होतात. त्यावर शस्त्राने छेद घेऊन घोसाळीचे पान इत्यादींनी खरडून काढणे ही मुख्य चिकित्सा आहे. साध्य नेत्ररोग.

**उत्सन्न**–वि., **उत्कटः** ( सुनि. ५.६ ) **उद्गतमांसः** ( चचि. २५.२०–२१ ) **वृद्धः** ( चसू. १३.५३ ) **उद्भूतम्** ( चक. ७.२७ )
इतरांपेक्षां अधिक असणे, दिसणे. ( व्रण–दोष ) वर उचलून आलेला ( व्रण ) वाढलेला ( दोष ) उत्पन्न झालेले–वाढलेले पित्त.

**उत्सर्ग**–पु.. **विसर्जनम्, उत्सर्जनं, प्रवर्तनम्**
( चसू.. २८.२२ )
सोडणे. बाहेर टाकणे, प्रवृत्त करणे.

**प्रायोभावी सामान्ये नियमः** ( चवि. ८.१३४ )
बहुतकरून जे घडत असते तो नियम. त्याला उत्सर्ग म्हणतात. उत्सर्गाला अपवाद असतो. पण अन्वय-व्यतिरेकाने सिद्ध झालेल्या नियमाला अपवाद नसतो.

**उत्सर्पिणी**–स्त्री., **उन्नतिकालः** ( काशा. पृ. ४४ )
उन्नतीचा काळ, वाढण्याचा काळ.

**उत्सा**–स्त्री., **निम्नादुत्तिष्ठज्जलस्थानम्**
स्रोत–झिरपाव, खोलातून वर येणारा जलस्रोत. झरा. पहा 'उत्स'

**उत्सादन**–न., **उद्वर्तनम्, पिष्टादिना शरीरमलापकरणम्** ( चसू. १.९१ )
उटणे. सुगंधी चूर्ण किंवा सुगंधी पदार्थयुक्त पीठ अंगास चोळणे. हे त्वचेचा मळ व मेदाचा नाश करते.
**उपक्रम० निम्नव्रणस्य उन्नतिकरणम्, मांसवर्धनम्** ( सुचि. १.८ )
**परिशुष्कमांसानां अल्पमांसानां गंभीराणां च वातात्मकानां रक्तपित्तात्मकानां चापामार्गादिभिः सर्पिःसंस्कारं आलेपनं च कर्तव्यम्** ( सुचि. १.८२ )
**उत्सादनीयद्रव्याणि–अपामार्गाश्वगन्धा, तालपत्री, सुवर्चलादीनि** ( सुसू. ३७.३० )
मांस सुकले किंवा अत्यल्प आहे आणि गंभीर स्वरूपाच्या वातात्मक व रक्तपित्तात्मक प्रकृतीसाठी अपामार्गादि सिद्धघृताचा संस्कार, लेपही करणे योग्य आहे. घृतातील द्रव्ये–अघाडा, आस्कंध, रानबडीशेप, सूर्यवेल इ०
**मांसवर्धनम्** ( ड. सुसू. ३७.३० )
व्रणांतील मांस वाढवणे.

**उत्साह**–पु., **चैतसिको धर्मः, मनस उल्लासः** ( सुचि. ३८.५० ) ( चसू. १८.४९ )
**सर्वचेष्टासूद्योगः** ( अहृसू. ११.१ )
**अध्यवसायः** ( अहृसू. ११.१ हेमा. )
मनाचा धर्म. मनाला उल्हास वाटणे, उभारी वाटणे, काम करण्याला हुषारी वाटणे. काम करण्याची प्रवृत्ती. काम करावेसे वाटणे. कोणते ही काम करण्यास आरंभ करण्याची वृत्ती. आनंदाने प्रयत्न करणे. कामाची तत्परता.

**उत्सुहितस्रोतस्**–वि., **ऊर्ध्वपूरितस्रोतसः शिशोः कासश्वासवमीप्रादुर्भावः** ( सुशा. १०.२९ )
आमाशय फुप्फुस अशा वरच्या अवयवांची स्रोतसे दोषांनीं भरून दोषांची वरच्या मार्गाने बाहेर जाण्याची प्रवृत्ती असलेला बालरुग्ण. खोकला, श्वास, वांती हे उपद्रव.

**उत्सृष्ट**–वि., **त्यक्तम्** (सुसू.४६.४७६) सोडलेले, टाकलेले.
**–बहिर्वेग**–वि., **त्यक्तविण्मूत्रादिकः** ( सुचि. ३८.३ )
मलमूत्र इत्यादिकांच्या वेगांचे उत्सर्जन केलेला शौचाला लघ्वीला जाऊन आलेला.

**उत्सेक**–पु., **आधिक्यम्, प्रवर्तनम्** ( सुचि. ३७.१२६ )
अधिकता, अधिक प्रवृत्ती ( शुक्राची ) शुक्रस्राव.
**अतिगर्वः** ( चसू. ८.२७ )
अतिशय घमेंड, अतिशय उद्दामपणा, अतिशय ताठा, अति अभिमान, अतिशय उर्मटपणा.

**उत्सेध**–पु., **उन्नतिः** ( चवि. ८.११७ ) उन्नति–उंची.
**उन्नतत्वम्** ( चसू. १८.८ )
पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणे वर येणे; उचलून वर येण्याचा धर्म.
**शोफः** ( असंनि. १३ ) सूज.
**उच्छ्रायः** ( र. ९.६ ) उठाव, स्थूलता, उच्चता.

**उत्सेहन**–न., **उन्मार्गगमनम्** ( चवि. १.२५ ( ७ )
वर जाणे. दोष स्वस्थानातून बाहेर जाणे. उलट्या मार्गाने जाणे.
**अन्यनाडीगमनमन्नस्य** ( असंसू. १०.२५ )
अन्न अन्नमार्गाने न जाता श्वास मार्गात जाणे.

**उदक**–न., **जलम्** ( चसू. २७.९८ ) जल, पाणी.
**–ज**–न., **वनस्पति० पद्मम्** ( सुउ. ४२.१०८ )
पाण्यात होणारे कमळ.
**–धरा**–स्त्री., **त्वग्विशेषः, षट्सु त्वक्षु प्रथमा बाह्यत्वक्** ( चशा. ७.४ )
एक त्वचा; सहा त्वचांपैकी पहिली बाहेरची त्वचा.
**–पायित**–वि., **पायना, निर्वृत्तानां शस्त्राणामग्नितप्तानां तत्क्षणाद्द्रवद्रव्येषु निर्वापणं पायना** ( सुसू. ८.१२ )
अग्नीमध्ये लालभडक तापविलेले व तत्क्षणी पाण्यात बुडविलेले शस्त्र, पाणी दिलेले शस्त्र. पाणीदार शस्त्र.
**–पूर्णदृतिक्षोभसंस्पर्श**–वि., **जलपूर्णदृतेश्चालनात् यः संस्पर्शस्तद्वत्संस्पर्शो यस्य–उदरस्य सः; जलोदररोगावस्था०** ( चवि. १३.४७ )
पाण्याने भरलेल्या पखालीला धक्का मारला तर आतल्या पाण्याचा धक्का पखालीला लागतो. त्या धक्क्याचा होतो तसा जलोदरात पोटाचा स्पर्श लागतो. हे जलोदाराचे एक लक्षण.
**–पूर्णोदर**–वि., **उदकनिमज्जनादितो बहुपीतोदकः** ( सुसू. २७.२० )

**रोग० तत्स्वरूपं चिकित्सा च जलनिमज्जनाद् जलमृतादीनां मृतोपमानां जलपूर्णमुदरम् भवति। एवं विधमुदकपूर्णोदरं नरमवाक्शिरसमवपीडयेद्, धुनीयाद्वामयेद्वा भस्मराशौ वा निखनेदामुखात्** ( सुसू. २७.२० )
**चक्राद्यारोपणं च** ( अरु. अहृसू. २८.४० )
एक रोग. पाण्यात बुडालेल्या, मरणप्राय झालेल्या किंवा मेलेल्याचे पोट पाण्याने भरते म्हणून त्याला उलटा टांगून पोट व छाती दाबून ते पाणी काढावे; त्याला झोके द्यावेत; चाकावर घालून गरगर फिरवावे. राखेच्या ढिगाऱ्यात तोंडापर्यंत पुरावे.

**–प्रक्षेपण**–न., **सलिलपूर्णे भाजने वस्त्रादिपीडिते आकण्ठमपरशीतजलनिक्षेपः जलशीतलकरणोपायेष्वेकः** ( सुसू. ४५.१९ )
पाणी थंड करण्याचा उपाय. पाण्याच्या भांड्याला ओले फडके गुंडाळून त्यावर पाणी शिंपडणे.

**–प्रादुर्भाव**–पु., **उदरे जलोत्पत्तिः** ( चचि. १३.४८ )
पोटात पाणी होणे.

**–मञ्चिका**–स्त्री., **निक्षेपण० आकाशान्तराले निरन्तरनिहितवेत्रवेण्वादिविरचिता वेत्रगृहाद्यभिधाना जले भूम्यादिस्पर्शाभावाद्दोषान्तरानुदयार्थमुपयुज्यते** ( सुसू. ४५.१८ )
शिंके. जमिनीवरचे दोष पाण्यात येऊ नयेत म्हणून दोरी, मुंजा, वेत इत्यादिकांचे केलेले वर टांगलेले, अधांतरी असलेले, पाण्याचे भांडे ठेवण्यासाठी आधारभूत साधन.

**–मूर्च्छित**–वि., **जलसंयुक्तः** ( चचि. १३.४३ )
जलयुक्त, जलमिश्रित.

**–मेह**–पु., **कफमेहरोग० शीतं श्वेतं निर्गन्धं बहूदकमिव स्वच्छं मूत्रं मेहति** ( चनि. ४.१० )
**तत्र चिकित्सा–पारिजातकषाय उपयुक्तः** ( सुचि. ११.९ )
कफमेहाचा प्रकार. नित्यापेक्षा कमी उष्णतेचे, पांढरे वास न येणारे, प्रमाणाने पुष्कळ, पाण्यासारखे स्वच्छ, मूत्र ज्यात असते तो प्रमेह, यात वाताचा संबंध नसल्यास कडुनिंब आणि संबंध असल्यास देवदाराचा काढा उपयुक्त होतो.

**–वहस्रोतस्**–न., **अब्धातुवहस्रोतस.**
**उदकवहे द्वे स्रोतसी तयोर्मूलं तालु क्लोम च तत्र विद्धस्य पिपासा सद्योमरणं च** ( सुशा. ९.१२ )
अब्धातु वाहणारे स्रोतस्. शरिरात जलवाही स्रोतसे दोन आहेत त्यांचे मूळ टाळू व क्लोम ह्या अवयवात असते; यातून ती निघतात. ती छेदली गेली की, तहान फार लागते. व ताबडतोब मरण येते.

**–सात्म्य**–( परिव ) न., **सात्म्य० उदकग्रहणाद्द्रवद्रव्याणां सात्म्यं गृह्यते** ( सुसू. ३५.३९ )
सात्म्याचा एक प्रकार. द्रव–पातळ द्रव्यांचे सात्म्य असणे. पातळ द्रव्ये शरिरात आत्मसात होणे. आरोग्यकारक होणे. रोगकर न होणे. उदकशब्दाने सर्व द्रवद्रव्ये गृहीत आहेत.

**उदकान्तरित**–वि., **उदकस्य भोजनमध्ये पानम्, आदौ पिण्डीमध्ये जलम् अन्ते च पिण्डी इति उदकान्तरितम्, सक्तुभक्षणविधावुदकान्तरितभक्षणं न विहितम्** ( अहृसू. ६.३९ )
जेवणात मध्ये पाणी पिणे; उदकांतरित भक्षण हे सातूच्या बाबतीत वर्ज्य आहे. म्हणजेच सातूच्या घट्ट पिठाचे सेवन करून पाणी पिणे व पुन्हां घट्ट सातूचे पीठ खाणे वर्ज्य आहे.

**उदकीर्य**–पु., **वनस्पति० करञ्जभेदः, अस्य फलं पक्वाशयगते दोषे विरेकार्थमुपयुज्यते, चिरबिल्वः** ( ध. ५.१०९ )
घाणेरा करंज. दोष पक्काशयात गेले असता याचे फळ रेचक कार्य करण्यासाठी उपयुक्त; करंज. एक करंजाचा प्रकार.

**उदकीर्यका**–स्त्री., **वनस्पति०=उदकीर्यः** ( सुसू. २.९ )
पहा 'उदकीर्य'

**( उदकीर्या )**–स्त्री., **वनस्पती०=उदकीर्यः** ( चसू. ३९.९ ) पहा 'उदकीर्य'

**उदकुम्भ**–पु., **जलपूर्णकुम्भः प्रस्थानेऽस्य दर्शनं शुभम्** ( सुसू. २९.२७ )
पाण्याने भरलेला कलश, घडा, कळशी, घागर. कामाला घराबाहेर जाण्याला निघण्यापूर्वी–निघण्याचे वेळी–निघतांना पाण्याने भरलेली घागर दिसणे हे शुभचिन्ह समजतात.

**( उदकुम्भी )**–स्त्री., **उदकुम्भः** ( असंसू. ३८ )
पाण्याने भरलेली घागर.

**उदकोष्ठ**–पु., **उदकसञ्चयार्थं पात्र०** ( चसू. १५.७ )
पाणी सांठविण्याचे भांडे. पाण्याची डेग. हांडा, पिंप, रांजण.

**उदक्प्रवण**–वि., **उदीच्यां निम्नम्** ( चशा. ८.१० )
उत्तरेकडे उतरता भाग, उत्तरेकडे खोल भाग.

**उद्गयन**–न., उत्तरायणम्, सूर्यस्य उत्तरस्यां दिशि संक्रमणम् ( चवि. ८.९ )
सूर्याचे उत्तर दिशेकडे जाणे, वळणे.

**उदग्र**–वि., **उन्नतम्** ( सुशा. १०.४६ )
उन्नत, वाढलेले, मोठे ( मन )

**–वयस्**–वि., **तरुणः** ( सुचि. २६.३ )
तरुण, प्रौढ, वाढल्या वयाचा.

**उदञ्चन**–न., **पिधान शरावः** ( चसू. १५.७ )
झांकण, झांकणी.

**उदधि**–पु., **समुद्रः** ( सुचि. ३५.३० ) समुद्र, सागर.

**–कफ**–पु., **समुद्रफेनः** ( असंउ.२४.२३१ ) समुद्रफेस.

**–फेन**–पु., **समुद्रफेनः, जाङ्गमद्रव्य०**
**तद्गुणाः–शीतः कषायोऽतिलेखनश्च** ( ध.३.१५४ )
समुद्रफेस, एक जंगमद्रव्य. जलचर प्राण्याचे हाड. समुद्रफेस शीत, तुरट व अत्यंत लेखन करणारा आहे.

**–मल**–पु., **समुद्रफेनः** ( असंसू.१२.२२ ) समुद्रफेस.

**उदपान**–पु., न., **उदकं पीयते येन तद्** ( चसू. १५.६ )
विहीर. पाणी पिण्याचे भांडे.
**कूपः सरः** ( असंउ. ४ पृ. ४१ ) आड, तलाव.

**–घट**–पु., **उदकपानार्थं घटः** ( चवि. ३.३६ )
घागर, गडवा, तांब्या.

**उदमन्थ**–पु., **जलालोडितसघृतसक्तवः** ( चसू. ६.१८ )
पाण्यात कालवलेले भाजलेल्या जवाचे पीठ–सत्तु, सातूचे पीठ.
**बहुद्रवाः सक्तवो ग्रीष्मादन्यस्मिन्नृतौ गर्हिताः** ( असंसू. ७.२४४ )
अगदी पातळ कालवलेले सातूचे पीठ उन्हाळ्या-खेरीज इतर ऋतूत पिऊ नये.

**उदय**–पु., **जन्म, उत्पत्तिः** ( चचि.३.५ ) जन्म. उत्पत्ती.

**–भास्कर**–पु., **सिद्धौषधि० कज्जलीकल्पः,**
**तद्गुणाः–प्रमेहरक्तपित्ताऽतिसारश्वासकासनाशनः** ( र. १७.११०–१२० )
एक सिद्ध औषधि. प्रमेह, रक्तपित्त, अतिसार, श्वास, कास, नाशक आहे.
**सर्वशूलनाशनोऽनुपानं ताम्बूलपत्रखण्डम्** ( र. १८.१४८–१५३ )
विड्यातून दिल्याने सर्व शूल नाशक आहे. हा दुसरा कल्प शूल नाशक. अनुपान–विड्याचे पानाचा तुकडा.

**–मार्तण्ड**–पु., **सिद्धौषधि० कज्जलीकल्प०**
**गुणाः–उदरशोफभगन्दरनाशकः** ( र. १९.३६–३८ )
एक सिद्धौषधि. उदर, सूज, भगंदर नाशक.

**उदयन**–न., **मोक्षोपायः** ( चशा. ५–१२ )
मोक्षाचा उपाय. उन्नतीचा मार्ग.

**उदयादित्य**–पु., **सिद्धौषधि० कज्जलीकल्प० गुणाः–श्वेतकुष्ठस्य साध्यस्याऽसाध्यस्य वा विनाशकरः** ( र. २०.२०६–२१३ )
एक सिद्ध औषधी. साध्य व असाध्य पांढऱ्या कुष्ठाची नाशक.
**जरारजनीहरः** ( र. २६.५–७ ) वृद्धावस्थारूपी रात्र-नाशक.

**उदर**–न., **शारीर० अन्तराधेरेकमुपाङ्गम्।**
शरीरायव. कोष्ठाचे एक उपांग. मेदाचे स्थान.
**उदरे चतस्रः पेश्यः** ( असंशा. ५ )
**चतुर्विंशति सिराः** ( असंशा. ६ )
**दशाङ्गुलविस्तारं द्वादशाङ्गुलमुदरम्** ( चवि. ८.११७; असंशा. ८.३० )
उदरात चार पेशी, चोवीस शिरा. स्वस्थ व्यक्तीचे उदर बारा अंगुळे लांब व दहा अंगुळे रुंद असते.
**पुरुषाणाम्—ईषदुन्नतमुदरम् अशिथिलम्, अकठिनं अविपुलं प्रशस्यते । दारिद्र्याय शुष्कम् । उन्नतं भोगाय । विशालविषमं विषमशीलभोगाय भृशशुष्कं चानपत्यम्** ( कासू. २८.६; पृ. ४८ )
**पुरुषाचे उदर**–थोडे वर आलेले, ढिले नाही पण कठीणही नसलेले आणि मोठे, आरोग्याचे दर्शक; शुष्क उदर दारिद्र्याचे दर्शक. वर आलेले उदर उपभोग घेणाराचे. मोठे व विषम उदर हे बदलत्या स्वभावाचे व मनात असेल तर अनुकूल असलेल्यांचा उपभोग घेणाऱ्या स्वभावाचे. व मनात नसेल तर उपभोग न घेणाऱ्या व्यक्तीचे दर्शक. अतिशय शुष्क पोट संतती न होण्याचे दर्शक.
**स्त्रीणाम्—अधस्तादुपचितमसिरमतिविपुलमवलीकमनायुषे । मध्यं नाभेरुपरिष्टादनायुषे । एकवलिकं धन्यम् । द्विवलिकं बुद्धिलाभाय । त्रिवलिकं सौभाग्याय चतुर्वलिकं प्रजायुषे । बहुवलिकमधन्यमनायुषे भवत्युदरम् ।** ( कासू. २८.६; पृ. ४८ )
**स्त्रियांचे** उदर–खाली मोठे व पुष्ट, शिरा नसलेले, अति घेरदार, मोठे, बळ्या नसलेले असे अल्पायुषी

असल्याचे दर्शक आहे. पोटावर एक वळी धनवान, दोन वळ्या बुद्धिमान, तीन वळ्या भाग्यवान, चार वळ्या पुत्रवान व आयुष्यमान, आणि फार वळ्या दारिद्र्य, व अल्पायुषी असल्याचे द्योतक आहे.

पु., **रोग० महागदेष्वेकः,**

**उदरोत्सेधाद्भवति, उदरगुहायां जायमान उदकसञ्चयपर्यवसायी शोथयुक्तो विकारः** ( र. ३.१३७ ) **कोष्ठानुसार्यन्तर्मार्गजो व्याधिः** ( चसू. ११.४९ )

**एक मोठा रोग**—उदरात होणारा व ज्याचे पर्यवसान पाण्याचा संचय होण्यात ( जलोदर होण्यात ) होते असा सूजयुक्त विकार. अंतर्मार्गात झालेला व कोष्ठात वाढणारा विकार.

**प्रकारः—वातपित्तकफसंनिपातक्षतबद्धयकृत्प्लीहोदकभेदैर्भिद्यमानः उदकचयावसायी उदरव्याधिः** ( र. १२.१ )

**उपद्रवयुक्तश्चाऽवार्यो भवति** ( सुसू. २३.१४ )

वातज, पित्तज, कफज, व संनिपातज असे चार प्रकार. आतड्याला चीर पडल्याने झालेले, कठीण अशा मळसंचयाने झालेले, यकृतोदर, प्लीहोदर व जलोदर असे पाच मिळून ९ प्रकार. सर्व प्रकारात शेवटी पाणी होणे हा ह्या विकाराचा स्वभाव.

**निदानं सम्प्राप्तिश्च—यस्य वातः प्रकुपितः सन् त्वङ्मांसान्तरमाश्रितः शोथं जनयति तस्य च कुक्षौ उदररोगो जायते** ( चसू. १८.३१ )

निदान व **संप्राप्ति**—प्रकुपित वात त्वचा व मांस या दोहोंमधल्या संधीत सूज करतो तेव्हां उदररोग उत्पन्न होतो.

**मलसञ्चयादिकारणैरूर्ध्वाऽधोधातवो वातादयोऽम्बुवाहिनीर्वाहिनीः रुध्वा प्राणाग्न्यपानान् संदूष्य त्वङ्मांससन्धिगाः सन्तः कुक्षिमाध्माप्योदरं कुर्युः** (असंनि. १२.३–४); **दुष्टो रसोऽनिलवेगनुन्न उपस्नेहवत् कोष्ठान्निःसृत्य त्वचः समुन्नम्य शनैरासमन्ताद्विवर्धमानः जठरं करोति** ( सुनि. ७.६–७ )

मलसंचयादिकारणांनी वातादी कुपित दोष रसवाहिन्यांच्या आश्रयाने स्रोतसांचा अवरोध करून प्राण व अपान वायु आणि अग्नीला दुष्ट करून उदरातील त्वचा मांस व संधीत शिरतात, तेथेच चिकट दूषित रस वायूकडून ढकलला जातो व कोष्ठ्यातून बाहेर पडून त्वचेला फुगवीत हळू हळू सर्व बाजूने पोट वाढवून उदररोग उत्पन्न करतो.

**सर्वमेवोदरमतिमात्रदोषसञ्चयानुबन्धेन स्रोतोमुखनिरोधात् व्याकुलानिलतया प्रजायते । सर्वं सर्वात्मकं कृच्छ्रतमं च** ( असंचि. १७.१ )

**मन्दाग्नित्वं मुख्यं कारणं तथा अजीर्णं मलिनान्नसेवनं जठरे मलसञ्चयश्च** ( असंनि. १२ )

**स्नेहादिमिथ्याचरणं चापि कारणम्** ( सुनि. ७.५ )

सर्व प्रकारच्या उदरात दोषसंचय अति होत राहिल्यानें स्रोतसांचा अवरोध होतो. व वातदुष्टि होऊन तीनही दोषांचा प्रकोप होत असल्याने उदररोग कष्टसाध्य असतो.

अग्निमांद्य हे मुख्य कारण व अजीर्ण, मलिन अन्नसेवन, मलाचा संचय आणि स्नेह स्वेदादि पंचकर्मे व्हावी तशी न होणे ह्या गोष्टीही ह्या रोगास कारणीभूत होत असतात.

**लक्षणम्—( सामान्यम् ) सर्वेष्वप्युदरेषु तन्द्रा सदनं मलसङ्गो दाहोऽल्पवह्निता श्वयथुराध्मानमन्त्रे उदकसम्भवश्च** ( असंनि. १२ )

**शुष्कतालुः शुष्कौष्ठः शूनपादकरोदरो नष्टचेष्टाबलाहारः कृशः प्रध्मातकुक्षिः प्रेतरूपश्च दृश्यते** ( असंनि. १२ )

**कुक्षेराध्मानमाटोपः पादकरस्य शोफो मन्दोऽग्निः श्लक्ष्णगण्डत्वं कार्श्यं चेत्येतान्युदरलक्षणानि** ( चचि. १३.२१ )

**गुल्मप्रकटितानि लक्षणानि** ( सुनि. ७.५ )

**सामान्य लक्षण**—सर्व उदररोगात डोळ्यावर झापड, अंग गळणे, मलसंचय, दाह, मंदाग्नि, सूज, पोट फुगणे, त्यात पाणी होणे, टाळू सुकणे, ओठ सुकणे, पाय, हात, पोटावर सूज, हालचाल, शक्ति व आहार नष्ट होणे, कृशता, पोट तुडुंब फुगणे, शरीर प्रेतासारखे दिसणे, पोटात गुडगुड, गाल तुकतुकित होणे ही व गुल्म रोगांत सांगितलेली लक्षणे होतात.

**पूर्वरूपाणि—क्षुन्नाशोऽन्नं चिरात् सविदाहं पच्यते जीर्णाऽजीर्णस्याज्ञानम् सौहित्याऽसहिष्णुता बलनाशः शश्वद् अल्पचेष्टितेऽपि श्वासः विड्वृद्धिः विडप्रवृत्तिः पादयोः किञ्चिच्छोफो बस्तिसन्धौ किञ्चिद्रुक् लघ्वल्पाऽभोजनैररतिततता जठरे राजीजन्म वलीनाशश्चेत्येतानि भवन्ति** ( असंनि. १२.७–१० )

**पूर्वरूपे**—मलावरोध, मळाचा संचय, भूक नाहींशी होणे, अन्न फार वेळाने व जळजळ करीत पचणे, अन्न जिरले की नाही हे न कळणे, पोटभर अन्न खाल्ले तर सहन न होणे, हलके व थोडे जेवले तरी पोट ताणले जाणे, ( तडस ) बस्तीच्या भागात किंचित वेदना, पायांवर किंचित सूज, पोटावरच्या वळ्या नाहीशा होणे, पोटावर शिरा दिसू लागणे. सारखी अशक्तता, थोड्या हालचालीने श्वास लागणे.

**वातोदरम्**—**पाणिपान्मुष्कसंन्धिषु शोफः कुक्षिपार्श्वोदरकटिपृष्ठेषु रुजा पर्वभेदनशुष्ककासोऽङ्गमर्दोऽधोगुरुता मलसंग्रहस्त्वगादीनां श्यावारुणत्वमकस्मात्ह्रासवृद्धियुक्तं चोदरं सतोदभेदं तनुकृष्णसिराभिस्ततं चोदरं तच्चाऽऽहतं सदाध्मातदृतिवच्छब्दं करोति सरुक् शब्दो वायुः सर्वतोगतिः सन् विचरत्युदरे** ( असंनि. १२.१४–१७ )

**रूक्षादिकर्शनान्तैः कुक्ष्यादिगो वायुः कुपितः सन्नग्निं हत्वा कफमुध्दूय तेन रुद्धगतिस्त्वङ्मांसान्तरमाश्रितः सन् उदरमाचिनोति**

( चचि. १३.२३–२४ )

**वातोदर चिन्हे**—अकस्मात पोट, हातपाय, वृषण व सांध्यावर सूज, कुशी, बरगड्या, पोट, कमर, पाठ यात पीडा, सांधे फुटल्यासारखे वाटणे, कोरडा खोकला, आंगमोडे येणे, खालचा भाग जड वाटणे, मलावरोध, त्वचा, नख, डोळे, इ. चे ठिकाणी काळसर तांबुसपणा, अकस्मात पोट कमी होणे अथवा वाढणे, त्यात टोचणी, फुटल्यासारखी पीडा, पोटावर बारीक विरळ व काळसर शिरांचे जाळे दिसणे, बोटाने ठोकले तर फुगलेल्या पखालीसारखा आवाज होणे, पोटात पीडा व आवाज करीत वायूचा सर्वत्र संचार, रूक्ष आहार व शरीर कृश करणाऱ्या इतर कारणांनी पोटातील वायु कुपित होतो, अग्नि मंद करतो, कफाला वाढवतो, व गति अडल्यामुळे त्वचा व मांसामध्ये शिरून उदर मोठे करतो.

**पित्तोदरम्**—**ज्वरो मूर्च्छा दाहस्तृट्कटुकास्यता भ्रमोऽतिसारस्त्वगादौ पीतत्वं हरिद्वर्णं चोदरं पीतताम्रसिरानद्धं सस्वेदं सोष्णं च दह्यते धूमायति मृदुस्पर्शं क्षिप्रपाकं प्रदूयते च**

( असंनि. १२.१६–१८.१९)

**अचिराभिवृद्धिश्च भवति** ( सुनि. ७.१० )

**कट्वम्लादिभिः समाचितं पित्तमनिलकफौ प्राप्य मार्गं रुध्वोन्मार्गमास्थितं सदाऽऽमाशयेऽग्निं निहत्योदरं कुरुते** ( चचि. १३.२३–२७ )

**पित्तोदर चिन्हे**—ज्वर, मूर्च्छा, दाह, तहान, तोंड कडु होणे, भ्रम, अतिसार, त्वचा, नखे, डोळे इ. पिवळे हिरवट होणे, पोटावर तांबड्या व पिवळ्या शिरांचे जाळे होणे, घाम, उष्णता, दाह, धूर निघतो आहेसे वाटणे. पोट मऊ लागणे, पोटाची वाढ लौकर होणे व जलोदरात लवकर रूपांतर होणे ही लक्षणे होतात. ह्या ठिकाणी तिखट, आंबट इ० आहारामुळे संचित पित्त वातकफाशी मिश्र होऊन स्रोतसांचा अवरोध करते व जठराग्नीला मंद करून हा उदर विकार करते.

**कफोदरम्**—**अङ्गसदनं स्वापः श्वयथुगौरवं निद्रोत्क्लेशोऽरुचिः श्वासः कासस्त्वगादीनां शुक्लत्वमुदरं तु स्तिमितं स्निग्धं श्वेतराजीततं चिराभिवृद्धिकठिनं शीतस्पर्शं गुरु स्थिरं महच्च जायते** ( असंनि. १२ )

**अव्यायामादिभिः क्रुद्धेन श्लेष्मणा स्रोतःस्वावृतेष्वावृतो वायुरन्त्रगो भूत्वा श्लेष्माणं पीडयन्नुदरं कुर्यात्**

( चचि. १३.२९–३० )

**कफोदर लक्षणे**—अंग गळणे, झोप, सूज, जडत्व, निद्रा, तोंडाला पाणी सुटून मळमळ वाटणे. अरुचि, श्वास, खोकला, त्वचा वगैरे पांढरी, पोट ताठणे, तुळतुळित दिसणे, त्यावर पांढऱ्या शिरांचे जाळे दिसणे, वाढ सावकाश होणे, पोट कठिण, स्पर्श शीत, जड, न हलणारे व मोठे होते. येथे व्यायामादि न करणे अशा कारणांनी कफ वाढून तो स्रोतसांचा अवरोध करतो, वायु आंतड्यात शिरून त्या कफाला अधिक दूषित करून हा उदरविकार उत्पन्न करतो.

**संनिपातोदरम्**—**त्रिदोषकोपनैस्तैस्तैस्तथा स्त्रीदत्तैः रजोमलैर्गरदूषीविषादिभिश्च सञ्चिताः सरक्ता मलाः कोष्ठं प्राप्य शोफमूर्च्छाभ्रमान्वितं शीघ्रपाकं सुदारुणं त्रिदोषजमुदरं कुर्वन्ति । तच्च शीतवाताभ्रदर्शनेऽतीव बाधकम्** ( असंनि. १२.२२–२४ )

**कारणे**—त्रिदोषकोप करणारी कारणे घडून तसेच दुष्ट स्त्रिया अन्नातून रज, मल इ० घालून तयार करतात ते गर विष खाण्यात आल्याने रक्तासह सर्व दोष कोठ्यात शिरून सूज, मूर्च्छा, भ्रम, इ. लक्षणांनी युक्त, लौकर पिकणारा,

भयंकर असा हा त्रिदोषज उदररोग करतात. हा रोग थंडी, वायु, अभ्र येणे यामुळे अतिशय वाढतो.

**छिद्रोदरम्**–अस्थ्यादिशल्यैः सान्नैर्भुक्तैरत्यशनेन वाऽन्त्रं भिद्यते पच्यते चान्त्रं तच्छिद्रैः स्रवन् आमः सविड्रसोऽल्पाल्पं गुदाद् बहिरेति–स कुणपगन्धतुल्यः पिच्छिलः पीतलोहितश्च भवति । अवशिष्ट आमो जठरमापूर्योदरं जनयति । तन्नाभेरधो वर्धते च शीघ्रं जलात्मतामेति । उद्रिक्तदोषलक्षणं श्वासतृड्भ्रमैश्च व्याप्तं वर्तते (असंनि. १२.३४–३८)

**छिद्रोदर कारणे**—अन्नाबरोबर हाड किंवा इतर कठिण पदार्थ जाणे, अति आहार यांनी आतडे फाटून जखम पुवळते; व स्रवणारा आम आणि मळयुक्त बुळबुळीत पिवळा व लाल आणि प्रेतासारखी घाण असलेला रस गुदावाटे पडतो. बाकीचा आम उदरात साठून ते मोठे करतो. तेव्हा पोटाचा नाभीच्या खालचा भाग मोठा होत असतो आणि त्यात लवकर पाणी होते. श्वास, तहान, भ्रम, इ. लक्षणे ही दोष अधिक वाढल्याचे दर्शवितात.

**बद्धोदरम्**–पक्ष्मवालैरन्नेन सहोपभुक्तैः सहोदावर्तैर्दुर्नामभिरन्त्रोपलेपिभिरन्नैर्बद्धायने गुदे कुपितोऽपानवायुर्वर्चःपित्तकफान् रुध्वोदरं करोति । तत्र दाहस्तृट् ज्वरः क्षवः कासः श्वासोरुसदनं शिरोहृन्नाभिपायुषु रुजा मलसङ्गोऽरुचिश्छर्दिरित्यादीनि लक्षणानि भवन्ति । उदरं तु मूढमारुतस्थिरं नीलारुणसिराराजीनद्धमराजिकं वा भवति तच्च नाभेरुपरि प्रायो गोपुच्छिकाकृति जायते ।

( असंनि. १२.३०–३१ )

**बद्धगुदोदर लक्षणे**–याचा आकार नाभीच्या वर गाईच्या शेपटासारखा असतो. मल, कफ, व पित्त यांचा रोध व संचय होतो. शिर, हृदय, नाभि, गुद यात वेदना. पोटावर निळ्या अरुण रंगाच्या शिरांचे जाळे दिसते. दाह, लहान, ताप, शिंका येणे खोकला श्वास, मांड्या गळणे, अरुचि, वांती इ. लक्षणे होतात. **कारणे**–मूळव्याध, वाताचा अवरोध असलेल्या रुग्णांनी चिकट अन्न, अथवा केस इत्यादि युक्त अन्न खाल्याने हा रोग होतो. यात मार्गावरोधाने कुपितवायु पित्त कफाला अडवण्याची क्रिया घडते.

**यकृदुदरम्**–अत्याशितस्य यानपानादिचेष्टितैः संक्षोभादतिव्यवायभाराध्वगमनव्याधिकर्शनैर्दक्षिणपार्श्वाश्रितं यकृत्स्थानाच्च्युतं विवर्धते वा रसादिभ्यो विवृद्धं शोणितं तद्विवर्धयति । तदष्ठीलेवाऽतिकठिनं कूर्मपृष्ठवत्प्रोन्नतं क्रमेण वर्धमानं कुक्षावुदरं करोति । तत्र श्वासकासपिपासाऽऽस्यवैरस्याऽऽध्मानपीडाज्वरपाण्डुत्वमूर्च्छाच्छर्दिदाहमोहाश्च भवन्ति । उदरमरुणाभं विवर्णं वा नीलहारिद्रराजिमच्च भवति ।

( असंनि. १२.२८–२९ )

**यकृदुदराची लक्षणे**–हे नाभीच्या वर उजव्या बाजूला वाढत असल्यामुळे उदराचा तो भाग कासवाच्या पाठीसारखा दडस, उंच व घेराचा दिसतो. उदर अरुण वर्णाचे दिसते किंवा विवर्ण निळ्या हिरव्या शिरा पोटावर येतात. पोट क्रमाने वाढते. पांडुत्व, खोकला, श्वास, इत्यादी चिन्हे सामान्यतः होतात. **कारणे**–अत्याहार, वाहनादिकांचे शरिराला धक्के व अतिसंभोग आणि श्रम इत्यादींनी यकृत स्थानापासून सुटणे. रक्त अधिक वाढणे.

**प्लीहोदरम्**–तुल्यहेतुलिङ्गौषधत्वात् यकृतोदरस्य प्लीहजठरे एवावरोध इत्येतत् प्लीहोदरं विद्यात्

( चचि. १३.३८; असंनि. १२.२४–३० )

**प्लीहोदर**–कारणे-चिन्हे व चिकित्सा–यकृत् व प्लीहोदराची एकच आहेत. फक्त प्लीहोदर हे नाभीच्या वर डावीकडे यकृतासारखे वाढते एवढाच फरक आहे.

**उदरम् अतोयम्**–अरुणमशोफं नातिभारिकं सिराजालगवाक्षितं गुडगुडशब्दवद्वातो नाभिं विष्टभ्य वेगं कृत्वा नश्यति हृत्कटीनाभिपायुवंक्षणेषु वेदना भवति वायोः सशब्दनिश्चारो बद्धविट्कताऽल्पमूत्रताऽनलो नातिमन्दो लौल्यमविरसं च मुखं स्यात्

( असंनि. १२.११–१३; चचि. १३.५५–५८ )

**पाणी नसलेले उदर**–तांबुस, सूज नसलेले फार जड न वाटणारे, शिरांचे जाळे, गुडगुड शब्द करणारा वारा बेंबीपाशी अडून सरण्याचा वेग येऊन सरत नाही, हृदय, कंबर, नाभि, गुद, जांघ यात वेदना, वारा शब्द करीत बाहेर पडतो. मळ बांधलेला, लघ्वी थोडी, अग्नि बरा, खाण्याची हाव असून तोंडालाही विरसता नसते.

**उपेक्षिते सति**–उदराणामुपेक्षया दकोदरे एव सर्वेषां पर्यवसानम् । दोषाः स्वस्थानच्युताः पाकाद्द्रवाः सन्धीन् स्रोतोमुखानि द्रवीकुर्युः । बाह्यस्रोतःसु विहतः स्वेदस्तिर्यगास्थितस्तदेवोदकमाप्यायय पिच्छां कुर्यात् । तदोदरं गुरु स्थिरं वृत्तमाहतेऽप्यशब्दं मृद्वपगतराजिकं नाभ्यां स्पृष्टं चेत्सर्पणशीलं च

**भवति। तदनूदकजन्म तेन चाऽधिका कुक्षिवृद्धिः सिरान्तर्धानं दकोदरोक्तलक्षणानि च भवन्ति**
( असंनि. १२.४२-४६ )

**उपेक्षापरिणाम**–उदर रोगाची उपेक्षा केल्याने सर्व प्रकारची उदरे शेवटी जलोदरात परिणत होतात. स्थानभ्रष्ट दोषांना पक्कावस्था प्राप्त होऊन ते द्रवरूप होतात व संधी आणि स्रोतसांची मुखे यांनाही शिथिल करतात. बाह्यस्रोतसांकडे जाणारा घाम हा मलही अडवला जातो असे हे सर्व वाढलेले जल चिकट होते त्यामुळे पोट मोठे, जड, स्थिर, वाटोळे, ठोकल्याने आवाज करणारे, मऊ, सगळ्या रेषा नष्ट झालेले, बेंबीजवळ स्पर्श केल्यास हलते. ते अनूदकजन्म उदर होय.

**उदकोदरम्–निदानसम्प्राप्तिलक्षणानि–प्रवृत्तस्नेहपानादेः सहसा आमाम्बुपायिनोऽत्यम्बुपानात्क्षीणस्याऽतिकृशस्य जलमूर्च्छितः कफो वायुश्चाऽम्बुमार्गान् रुध्वोदराश्रितौ तत्स्थानात्तदेवाम्बु वर्धयेताम्। तत् उदरं तृष्णागुदस्रुतिरुजाकासश्वासारुचियुतं नानावर्णसिराततं तोयपूर्णदृतिस्पर्शशब्दप्रक्षोभवेपथुयुतं महत्स्निग्धं स्थिरमावृत्तनाभि च भवति**
( असंनि. १२.३८-४१; चचि. १३.४५-४८ )

**जलोदरचिन्हे**–निदान व संप्राप्तिकारणे–क्षीण व अतिकृश मनुष्याने स्नेहपानादी क्रिया नंतर एकदम न तापविलेले थंड पाणी व अति पाणी पिणे. प्याल्याने वाढलेला कफ व वायु जलवह स्रोतसे रुद्ध करून उदरात जलसंचिति करतात. **चिन्हे**–उदराचा पाण्याने भरलेल्या पखालीसारखा स्पर्श व आवाज असतो तहान, गुदातून स्राव, पीडा खोकला व अरुचि होऊन नाभि प्रदेश दोषांनी वेढला जातो. निरनिराळ्या रंगाच्या शिरांचे जाळे होते.

**उदरोपद्रवाः—छर्द्यतीसारतमकतृष्णाश्वासकासहिक्कादौर्बल्यपार्श्वशूलारुचिस्वरभेदमूत्रसङ्गाद्युपद्रवा जातोदकावस्थानन्तरं प्रादुर्भवन्ति** ( चचि.१३.४९ )
**एवंप्रकारकम् अचिकित्स्यं ज्ञेयम्। पार्श्वभङ्गोऽन्नविद्वेषः शोफो विरेचनद्रव्यैर्बहुशो विरिक्तं पुनः पूर्यमाणमुदरम्** ( सुसू. ३३.१४ )

**उपद्रव**–श्वास कास उचकी फासळ्यात शूळ, मूत्र अडणे, तहान लागणे, ओकारी अतिसार, दुर्बलता, चक्कर येणे, अरुचि, स्वरभेद हे सर्व उपद्रव उदरात जल संचय झाल्यानंतर होतात. असे उदर असाध्य होते. शिवाय अन्नद्वेष, सूज आणि विरेचनाने बरेच ढाळ झाले तरी पुन्हा पोट पूर्ववत् भरतेच.

**साध्यासाध्यत्वम्—अष्टावुदराणि पूर्वमुद्दिष्टानि तेष्वसाध्यं बद्धगुदं परिस्रावि च अवशिष्टानि कृच्छ्रसाध्यानि सर्वाण्येव प्रत्याख्यायोपक्रमेत्**
( सुचि. १४.३ )
**वातपित्तकफप्लीहसंनिपातदकोदराणि यथोत्तरं कृच्छ्राणि बद्धोदरच्छिद्रोदरे च प्रायः पक्षादूर्ध्वं मारयतः। रिष्टोक्तोपद्रवान्वितं जातसलिलं सर्वमप्युदरमसाध्यम्। जन्मनैव सर्वमप्युदरं प्रायः कृच्छ्रतमं मतम्। बलिनो नवोत्थितं तदजाताम्बु यत्नसाध्यं ज्ञेयम्** ( असंनि. १२.४६-४८ )
**तेष्वाद्यश्चतुर्वर्गो भेषजसाध्यः कालप्रकर्षात् सर्वाण्येव शस्त्रसाध्यानि वर्जयितव्यानि।**
( सुचि. १४.३ )

**साध्यासाध्यत्व**–कोणतेही उदर अतिकष्टसाध्य. बलवानाचे, नवे, पाणी न झालेले ही प्रयत्नाने साध्य. वातादि पहिले चार औषधाने साध्य; पण उशिरा उपचार झाले तर शस्त्रसाध्य. बद्धगुदोदर, छिद्रोदर १५ दिवसांनंतर असाध्य, मारक. रेचकाने पुष्कळ रेच होऊनही कमी न होणारे उदर असाध्य. मारक उपद्रव युक्त व पाणी झालेलेही असाध्य.

**चिकित्सा—उदररोगविशेषे सामान्ययोगाः (१) एरण्डतैलमहरहर्मासं द्वौ वा केवलं मूत्रयुक्तं क्षीरयुक्तं वा सेवेत उदकवर्जी (२) माहिषं मूत्रं क्षीरेण गव्येन पिबेत् सप्तरात्रम् (३) उष्ट्रीक्षीराऽऽहारः–त्यक्तान्नसलिलो भवेत् पक्षं यावद् (४) पिप्पली वा मासं पूर्वोक्तेन विधानेनाऽऽसेवेत (५) निकुम्भतैलं सैन्धवाजमोदायुक्तं पानार्थम् (६) शृङ्गवेररसविपक्वं क्षीरमासेवेत (७) आर्द्रशृङ्गवेररसपात्रशतसिद्धं तैलं वातशूले प्रयुञ्जीत (८) चव्यशृङ्गवेरकल्कं सरलदेवदारचित्रकं वा पयसा पिबेत् (९) मुरङ्गीशालपर्णीश्यामापुनर्नवाकल्कं पयसा पिबेत् (१०) ज्योतिष्कफलतैलं क्षीरेण स्वर्जिकाहिङ्गुमिश्रं पिबेत् (११) गुडद्वितीयां हरीतकीं भक्षयेत्** ( सुचि. १४.१० )
**उदररोगे लवणमुपयुज्यते** ( चसू. १.९२ )
**उदररोगे आनाहवर्तिरुपयोज्या** ( सुचि. १४.११ )

**सामान्य चिकित्सा**–एरंडतेल गोमूत्राबरोबर, दुधाबरोबर किंवा नुसते दररोज महिना दोन महिने

घेणे, आणि या अवधीत पाणी वर्ज्य करावे. म्हशीचे मूत्र गाईच्या दुधाबरोबर ७ दिवस. अन्नपाणी सोडून १५ दिवस उंटिणीचे दूध घ्यावे. पिंपळी दुधांवरोबर एक महिना याच विधीने घ्यावी. किंवा दांतीचे तेल सैंधव व अजमोदा घालून प्यावे. आले घालून सिद्ध केलेले दूध, गूळ व हिरडा, सेवन करावा. वातशूल असतां आल्याच्या रसात शंभर वेळा सिद्ध केलेले तेल घेणे. चवक, सुंठ, किंवा सुरुवृक्ष, देवदार, चित्रक यांचा कल्क दुधाशी प्यावा. शेवगा, सालवण, वरधारा, पुनर्नवा यांचा कल्क दुधाशी, मालकांगोणीच्या फळाचे तेल दुधातून सज्जीखार व हिंग घालून प्यावे. वातनाशक वर्तींचा गुदमार्गात उपयोग करावा.

**दकोदरे जलनिर्हरणं कार्यम्** ( सुचि. १४.१८ )

**स्वेदचिकित्सा–वातारब्धे कफारब्धे चोदररोगे स्वेदो विधेयः, स च स्वेदः आजलप्राप्तेः। अत ऊर्ध्वं सर्वेषामस्वेद्यत्वम् । छिद्रोदरदकोदरिणोरेव तत्र निषेधोऽन्येषु यथास्वं स्नेहादयः प्रयोज्याः**
( डसुचि. १४.५ )

**शस्त्रचिकित्सा—बद्धगुदे परिस्राविणि च शस्त्रकर्म कर्तव्यम्** ( सुचि. १४.१७ )

**उदररोगेऽभुक्तवतः शस्त्रकर्म कुर्वीत । अन्नपूर्णकोष्ठत्वाद्यन्त्रदानादिभिः कष्टं मरणं वा प्राप्नोत्यातुरः।**
( डसुसू. ५.१६ )

**जलोदरात पाणी काढावे,** वात व कफजन्य उदरात आंग ओलसर होईतो घाम काढावा, इतर उदरात घाम काढणे वर्ज्य. छिद्रोदर, व जलोदरात निषेध आहे. इतर उदरात दोषांना अनुसरून स्नेहादींचा उपयोग करावा.

**शस्त्रचिकित्सा–**बद्ध गुदोदर व परिस्रावी उदरावर शस्त्रक्रिया करावी. उदररोगात शस्त्रकर्म अनशे पोटी करावे. नाहीतर कोठ्यात अन्न असल्याने यंत्र शस्त्रादींचे कष्ट होतील किंवा मरणही येईल.

**पथ्यापथ्यम्–उदरी गुर्वभिष्यन्दिरूक्षविदाहिस्निग्धपिशितपरिषेकावगाहान् परिहरेत् । शालिषष्टिकगोधूमान् नीवारांश्च नित्यमश्नीयात् ।**
( सुचि. १४.४ )

**जठर्यन्नं नाद्यात् तोयपानं च वर्जयेत् ईषत्सांद्रमुद्धृतस्नेहं स्वादु तक्रं पाने हितम्** ( चचि. १३.१०१ )

**अयं वमनार्थं न योग्यः** ( सुचि. ३३.१४ )
( असंचि. अ. १७ अहृनि. १२ अहृचि. १५ )

पथ्यापथ्य–उदररोग्याने जड, कफकर, रूक्ष, विदाही, स्निग्ध अन्न, मांसभक्षण, शेकणे, पाण्यात डुंबणे, वर्ज्य करावे, साठेसाळी, गहू, नीवार नावाचे तृण धान्य म्हणजे देवभात, लोणी काढलेले व अगदीच पातळ नसलेले गोड ताक घ्यावे. **वमन** देऊ नये.

**उदरचिकित्सित**–पु., **अध्याय० उदररोगस्य चिकित्सार्थं कृतोऽध्यायः** ( चचि. १३.१ )
अध्यायाचे नाव. उदररोगाची चिकित्सा सांगण्याकरिता दिलेला अध्याय.

**उदरमर्म**–न., **मर्म० गुदं बस्तिः नाभिश्चेति त्रीणि भवन्ति उदरमर्माणि** ( सुशा. ६.६ अहृशा. ४.१ )
उदरावकाशातील मर्मे. गुद, बस्ति व नाभि ही तीन होत.

**उदराद**–पु., **श्लेष्मजः क्रिमिविशेषः** ( चवि. ७.१२ )
उदर खाणाऱ्या कफज कृमीचे नाव

**उदरामय**–पु., **उदरे जातो व्याधिः अतीसारः**
( ड. ) सुउ. ४०.८३ ) ( चचि. १९.६० )
उदरातील रोग–आमय, अतीसार.

**उदरावेष्ट**–पु., **रोग० उदरस्यावेष्टनमिव आवेष्टः अशीतिवातविकारेष्वेकः** ( चसू. १९.४ ( ९ )
ऐशी वातविकारांपैकी एक. पोट वेढल्यासारखे, आवळल्यासारखी वेदना.

**क्रिमि० विंशतिक्रिमिजात्यन्तर्भूतेषु सप्तसु कफजेष्वेकः**
( चसू. १९.४ ( ९ )
कृमींच्या २० जातींपैकी एक कृमि. कफज सात कृमिजातींपैकी एक कृमि.

**उदर्द**–पु., **रोग०** ( चसू. २०.१० )

**व्याधिस्वरूपम्–प्रायः शिशिरसम्भवः, सरागैः कण्डूमद्भिरुत्सन्नैर्मण्डलैः सहितो बहिःशरीरे त्वगुपरि भवति । उदर्दस्तु कफाधिकः वाताधिकं तु शीतपित्तम् ।**

**शीतपित्तोदर्दयोः सामान्यं निदानं–शीतमारुतसंस्पर्शाद्दुष्टौ कफमारुतौ पित्तेन सह सम्भूय बहिरन्तर्विसर्पतः उदर्दं शीतपित्तं च जनयतः ।**

**उदर्दलक्षणम्–बहिस्त्वचो वरटी नामककीटविशेषदष्टसंस्थानः सकण्डूस्तोदबहुलश्छर्दिज्वरविदाहवान शोथः । भेषजसाध्यो व्याधिः कटुकरसेनोपहन्यते**
( मा. ) ( चसू. २६.४३ ( ४ ) अहृसू. १०.१७ )
एक रोग. हा थंडीपासून बहुधा होतो. त्वचेवर गांधीलमाशी डसते तेव्हा जशी गाठाळ पुळी येते तशा गोल आकाराची तांबडट, खाजयुक्त व वर

उचलून आल्यासारखी मंडले उत्पन्न होतात. दोन प्रकार. एक कफाधिक असतो तो उदर्द व वाताधिक असतो तो शीतपित्त. ह्या दोन्ही विकारांचे सामान्य कारण–त्वचेला अति थंड वारा लागून कफवातदुष्टि होते. व ती पित्तासह मिळून शरिराच्या आंत व बाहेर संचार करीत असता हे विकार होतात,

**उरोऽभिष्यन्द उदर्दः केषांचिच्छीतवेपथुरुदर्दः**
( असंसू. २०.१६–१७ )

उरस्थानात–फुप्फुसात स्राव होऊन साठला, व कफ झाला की, त्याला उदर्द म्हणतात. कित्येकांना या विकारात थंडीमुळे कांपरे भरते.

**–प्रशमन**–वि., **महाकषायवर्गे तिन्दुकप्रियालादि**
( चसू. ४.१७ ( ४३ )

उदर्द कमी करणारा वर्ग टेंभुरणी चारोळी इत्यादी औषधांचा गण.

**उदर्दित**–वि., **उन्मादरोगेऽरिष्टलक्षणेषु एकम् उदर्दयुक्तः ऊर्ध्ववातार्दितो वा** ( चइ. ५.१९ )

उन्मादरोगात होणाऱ्या अरिष्ट लक्षणातील एक. उदर्दयुक्त किंवा ऊर्ध्ववाताने पीडित.

**–त्व**–न., **ऊर्ध्वकाये पीडितत्वम्** ( चनि. ७.६ )

शरिराच्या ऊर्ध्व भागात पीडा होणे.

**उदर्य**–पु., वि., **जाठराग्निः, जठरस्थः** ( चचि. १५.७ )

जठरात असणारा. जठराग्नि, पाचकाग्नि.

**उदश्वित्**–न., **तक्रभेदः नष्टार्तवोपचारेषु पानार्थमेकं द्रव्यम्, अर्धोदकं तक्रम् दध्यर्धप्रमाणेन जलेन सह आलोडितं तक्रम्** ( सुशा. २.२२ )

**एतच्च काललवणसहितं वातशूले प्रशस्तम्**
( सुउ. ४२.९२ )

ताकाचा एक प्रकार. दह्याच्या निम्मे पाणी घालून घुसळलेले ताक. नष्टार्तवावर पिण्याकरिता उपयुक्त. वातशूलावर संचळ घालून घेणे उपयुक्त.

**दधिसमभागजलेन कृतं तक्रम्** ( चवि. ८.१३६ )

दह्याइतकेच पाणी घालून केलेले ताक.

**सस्नेहं सजलं तक्रमुदश्विदिति कथ्यते**
( सुसू. ४५.८५ )

पाणी घालून साईसह दह्याचे केलेले ताक.

**उदश्वित**–न., उदश्वित्, ( ध. ६.२११ )

पहा 'उदश्वित्'

**उदान**–पु., देहस्थवायु० **वायोः पञ्चप्रकाराः प्राणाऽपान-समानोदानव्यानाः । ऊर्ध्वमागच्छन्वायुरुदानः ।**
( सुनि. १ )

**उद् ऊर्ध्वं अनिति श्वसिति अनेन प्राणी इति**
( सुनि. १.१४ )

**तत्स्थानम्**–**उदानस्य पुनः स्थानं नाभ्युरःकण्ठ एव च** ( चचि. २८.७ )

**तत्कर्म**–**वाक्प्रवृत्तिः प्रयत्नः उर्जाबलवर्णादि**
( चचि. २८.७ )

**तेन भाषितगीतादिविशेषोऽभिप्रवर्तते**
( सुनि. १.१५ )

शरीरातील एक वायु. वर येणारा वायु. उदान. मनुष्य ज्याच्याने वर श्वास नेतो–बाहेर सोडतो तो उदान. उदानाचे स्थान–नाभिप्रदेश, उरस्थान, कंठ, नाक. त्यांची कर्मे–बोलण्याची प्रवृत्ति, प्रयत्न, उत्साह, बळ, वर्ण, गाणे, उच्छ्वास इ.

**आवृतः (उदानः)–वातावृतः–**

**व्यानादिभिः ( व्यानोऽपानः, प्राणश्च ) त्रिभि-रेवोदानः आवृतो भवति** ( अहनि. १६.५०–५२ )

**(१) प्राणावृतः–तल्लक्षणानि–**

**शिरोग्रहः प्रतिश्यायो निःश्वाससंग्रहः उच्छ्वाससंग्रहो हृद्रोगो मुखशोष इत्येते उदाने प्राणावृते भवन्ति, तस्योर्ध्वभागिकं कर्म कार्यं आश्वासनं तथा ।**
( चचि. २८.२०६–२०७; असंनि. १६ )

व्यानादिकांनी उदान आवृत होतो. व्यानादी वायु उदानाच्या कार्यावर आवरण आणतात; अडथळा करितात. प्राणाने उदानाला आवृत केले तर डोके जखडणे, पडसे, श्वास टाकण्याला व घेण्याला अडचण. हृद्रोग आणि तोंडाला कोरड ही चिन्हे होतात. चिकित्सा–जरूर तसे नाकात नस्य कानात तेल इत्यादीचा उपयोग व धीर देणे.

**(२) अपानावृतः–तल्लक्षणानि–**

**अल्पोऽग्निर्मोहोऽतीसारो भवति । तत्र चिकित्सा–वमनं कर्तव्यं तथा च दीपनं ग्राहि चाऽशनं कार्यम्**
( चचि. २८.२१०–२११ )

अपानाने उदानाचे आवरण केले तर कार्याकार्य विवेक नष्ट होणे किंवा मूर्च्छा, अतिसार, आणि अग्नि मंद होणे ही लक्षणे होतात.

चिकित्सा–ओकारीचे औषध देऊन अग्निदीपक व मळ बांधून घट्ट करणारी औषधे द्यावीत.

**व्यानसहित उदानश्छर्दिकरः** ( सुउ. ४९.७ )

आमाशयात वाढलेले दोष उदानवायु व्यानाच्या सहाय्याने वरच्या बाजूने तोंडावाटे बाहेर टाकतो. वांती निर्माण करितो.

**पित्तावृतः–तल्लक्षणानि–नाभ्युरसोः क्लमो दाहो मूर्च्छाऽऽदीनि रूपाण्योजोभ्रंशः सादश्च**
( चचि.२८.२२३–२२४ )

मूर्च्छा, अपस्मार, दाह, छातीत व पोटात थकवा वाटणे, अंग गळाल्यासारखे वाटणे व ओजाचा नाश ही लक्षणे होतात.

**कफावृतः–तल्लक्षणानि–गुरुगात्रत्वम् रुचिर्वाक्स्वरयोर्ग्रहो बलवर्णयोः प्रणाशः ( असंनि. १६ )**
( चचि.२८.२२४–२२५ )

कफाने उदान आवृत झाला तर वर्ण वाईट होतो, नीट बोलता येत नाही, स्वरही बिघडतो, स्वर उमटण्याला अडचण वाटते. दुर्बळता येते, अवयव जड वाटतात आणि तोंड बेचव होते.

**–प्रकोप**–पु., **निदानं व्याधयश्च क्षवथूद्गारच्छर्दिनिद्राविधारणैर्गुरुभारातिरुदितहासाद्यैर्विकृत उदानः कण्ठरोधमनोभ्रंशच्छर्द्यरोचकपीनसगलगण्डादीन् जत्रूर्ध्वसंश्रितान् रोगान् करोति**
( असंनि. १६.२३.२४ )

उदानाचा प्रकोप. कारणे–शिंका, ढेकर, ओकारी, झोप येत असता अडविले, येऊ दिले नाही, जड ओझे वाहिले, अतिशय रडले, अतिशय हसले तर तर उदान विकृत होतो.

विकार–घशात बांध घातल्यासारखे वाटते; ओकारी अरुची, दुष्ट पडसे, गलगंड इत्यादी खांद्याच्या वरचे सर्व विकार आणि चित्तभ्रंश होतो.

**–भाव**–पु., **ऊर्ध्वगतिस्वभावः** ( चचि. १८.६ )
वरच्या दिशेने जाण्याचा स्वभाव.

**उदार**–वि., **अपीडाकरम्** ( सुउ. ३९.२६१ )
दुःख न देणारा.

**आधिक्येन संपन्नः** ( सुउ. १२.४ )

**धर्माऽविरुद्धो मनोऽनुकूलश्च** ( सुउ. ४१.५८ )

मोठ्या मनाचा. मोकळ्या हाताचा. प्रमाणापेक्षा अधिक धर्माशी जुळणारा, मनाप्रमाणे.

**–गन्धि**–वि., **उत्तमगन्धि, सुगन्धि; सुगन्धिपुष्पाधिवासितम्** ( सुउ. ४८.२४ )
उत्तम वासाचा; सुगंधी; सुगंधी फुलांचा वास लावलेला.

**–धी**–वि., **महती धीः यस्य** ( सुउ. १८.३ )
मोठ्या बुद्धीचा.

**–रस**–पु., **जाङ्गलमांसरसः** ( सुउ. ४७.३६ )
श्रेष्ठ रस. रूक्ष प्रदेशातील मांसाचा रस.

**–वीर्य**–वि., **उत्कृष्टशक्तियुक्तम्** ( चचि. १२.५७ )
अतिबलवान.

**उदावर्त**–पु., **वातरोग० ऊर्ध्वं वातविण्मूत्रादीनामावर्तो भ्रमणं यस्मिन् रोगे स उदावर्तः, पुरीषं वायुना वर्तुलीकृतमुदावर्तमिति केचिन्मन्यन्ते लोकप्रसिद्धत्वात्** ( सुउ., ५५.१ )

**स च द्विविधः ( १ ) वेगविरोधजः ( २ ) उपद्रवरूपश्च,**

**वेगनिरोधज उदावर्तः–अत्र न वेगान् धारणीयोक्तन्यायेनोच्चारनिरोधजादय उदावर्ता उच्यन्ते ।**
( चसू. १९.४; (३)

**तेच वातविण्मूत्रजृम्भाश्रुक्षवोद्गारान्तरेन्द्रियक्षुत्तृष्णाश्वासनिद्रावमिवेगनिरोधजा भवन्ति त्रयोदशसंख्याकाः** ( सुउ. ५५.४ )

**एक वातरोग.**–ज्या रोगात, वात, विष्ठा, मूत्र, इत्यादींची त्यांच्या विसर्जन मार्गाच्या उलट गती निर्माण होऊन त्यांचे वरच्या दिशेने भ्रमण होते तो उदावर्त. वातप्रकोपाने मळाला वाटोळा आकार येणे व ( अशी लोकात कल्पना ) मळाच्या गाठी होणे. उदावर्त दोन प्रकारचा. मळांना विसर्जनाचा वेग असतां तो अडवल्याने होणारा, आणि रोगात उपद्रव म्हणून होणारा. वात, विष्ठा, मूत्र, शुक्र, जांभई, अश्रू, शिंक, तहान, भूक, ढेकर, श्वास, खोकला, झोप यांचे वेग धारण केल्याने वाताचा रोध होतो. तो १३ प्रकारचा विकार.

**वातनिरोधज उदावर्तः–लक्षणम्—**

**–आध्मानशूलौ, हृदयोपरोधः, शिरोरुक्, श्वासोऽतीवहिक्का, कासः, प्रतिश्यायो, गलग्रहो, घोरं श्लेष्मपित्तप्रसारणं च** ( सुउ. ५५.७ )

**वाताचा अवरोध** केला तर पोट फुगते; शूल, हृदयाला अडथळा, डोके दुखणे, श्वास, खोकला, अतिशय जोराची उचकी, पडसे. गळा धरणे, कफ व पित्ताचा शरिरात प्रसार.

**चिकित्सा—स्नेहविधिः, स्वेदविधिर्वर्तयो, भोजनानि, पानानि बस्तयश्च कर्तव्याः** ( चसू. ७.१३ )

चिकित्सा–तेल, तूप इत्यादी स्नेहपान, अभ्यंग, घाम काढणे–शेकणे, ढुंगणात औषधांनी भिजविलेले फडक्यांचे काकडे घालणे, वातहर अन्नपान व बस्ती.

**पुरीषनिरोधज उदावर्तः–लक्षणम्—**

आटोपशूलौ, परिकर्तनं, पुरीषसङ्ग ऊर्ध्ववातः, पुरीषमास्यादपि निरेति ( सुउ. ५५.८ )

**मळाची वेगावरोधलक्षणे**–गुडगुड, शूळ, कांपल्यासारखी वेदना, मळाचा संचय, वात वर चढणे.

चिकित्सा—स्वेदोभ्यङ्गावगाहौ, वर्तयो, बस्तिकर्म, प्रमाथ्यन्नपानं च हितम् ( चसू. ७.९ )

गरम पाण्यात बसणे, अनुलोमक अन्नपान व वरील उपचार.

मूत्रनिरोधजउदावर्तलक्षणम्—

कृच्छ्रेणाऽल्पमल्पं मूत्रं कुरुते, आनद्धबस्तिता, मेढ्रगुदवंक्षणबस्तिनाभिमुष्कप्रदेशेषु शूलाश्च भवन्ति ( सुउ. ५५.९–१० )

मूत्रावरोधाने–थोडे थोडे व कष्टाने लघ्वीला होते. बस्ति फुगणे, लिंग, वृषण, गुद, ओटी, जांघ, नाभी यात शूळ.

चिकित्सा—स्वेदाऽभ्यङ्गावगाहान् सर्पिषोऽवपीडकम्, त्रिविधं बस्तिकर्म च कुर्यात् ( चसू. ७.७)

**चिकित्सा**—अभ्यंग, अवपीडक स्नेह ( सकाळी अनशे पोटी व जेवण्यास बसताना गरम तूप ) द्यावा आणि निरुह अनुवासन व उत्तरबस्ती हे तिन्ही बस्ती द्यावे.

जृम्भानिरोधजउदावर्तलक्षणम्–मन्यास्तम्भो गलस्तम्भः, शिरोविकाराः श्रोत्राननघ्राणविलोचनोत्था विकारा भवन्ति ( सुउ. ५५.११ )

चिकित्सा–वातवत्

**जांभया** आडवल्या तर, गळा व मान ताठणे, कान, नाक, डोळे, शिर व मुखरोग होतात.

चिकित्सा–सर्व वातहर

बाष्पनिरोधजउदावर्तलक्षणम्–आनन्दजं शोकसमुद्भवं प्राप्तमुदकममुञ्चतः शिरोगुरुत्वं पीनसस्तीव्राश्च नयनामयाः ( सुउ. ५५.१२ )

हृद्रोगोऽरुचिभ्रमाः ( चसू. ७.२२ )

**अश्रू अडवले तर**–डोके जड, पडसे, डोळ्याचे तीव्र रोग होतात.

चिकित्सा–स्वप्नो मद्यं प्रियाः कथाः ( चसू.७.२२ )

**चिकित्सा**–मद्य, झोंप व गोड गोष्टी.

उद्गारनिरोधजउदावर्तलक्षणम्–घोराः पवनप्रसूताः विकारा हिक्का, श्वासोऽरुचिः, कम्प उरसो हृदयस्य च विबन्धः ( सुसू. ५५.१४ ) ( चसू. ७.१८ )

चिकित्सा–हिक्कावत्कार्या ( चसू. ७.१८ )



**ढेकर** अडवली तर वातज घोर विकार, उचकी, श्वास, रुची नाहीशी होणे, कंप, हृदय व उर यात बांध होतात.

**चिकित्सा**–उचकीसारखी.

क्षवथुवेगनिरोधजउदावर्तलक्षणम्–शिरोऽक्षिनासाश्रवणेषु गाढं रोगा भवन्ति, कण्ठास्ययोर्वायुना पूर्णत्वं व्यथा च, तथा च कूज उच्छ्वासाप्रवृत्तिः ( सुउ. ५५.१३ )

मन्यास्तम्भोऽर्दितार्धावभेदमिन्द्रियाणां दौर्बल्यम् ( सुउ. ७.१७ )

चिकित्सा–ऊर्ध्वजत्रुकेऽभ्यङ्गः स्वेदः सनावनो धूम औत्तरभक्तिकं घृतं च ( चसू. ७.१७ )

**शिंका** अडविल्या तर, डोके, नाक, डोळे, कान, यांचे तीव्र रोग, गळा, तोंड, यात वायू भरतो व वेदना होतात; व मान ताठणे, श्वास घेता न येणे, कण्हणे, तोंड वाकडे होणे; अर्धे डोके दुखणे, इंद्रिये दुर्बल होणे. हे विकार होतात.

**चिकित्सा**–जेवणानंतर तूप, गळा व वरच्या सर्व भागाला अभ्यंग, शेक, धूम्रपान, नस्य.

छर्दिनिरोधजउदावर्तलक्षणम्–छर्देश्च विघाताज्जायमाने उदावर्ते येन वाताद्यन्यतमेन दोषेण विदग्धं तदन्नं स्यात्तद्दोषाधिकं कुष्ठं भवति ( सुउ. ५५.१४ )

कण्डूकोठारुचिव्यङ्गशोथपाण्ड्वामयास्तथा च ज्वरः कुष्ठं हृल्लासो वीसर्प इत्येते च गदा भवन्ति ( चसू. ७.१४ )

चिकित्सा–भुक्त्वा प्रच्छर्दनं धूमो लङ्घनं रक्तमोक्षणं रूक्षान्नपानं व्यायामो विरेक इत्येतानि कर्तव्यानि ( चसू. ७.१५ )

**ओकारी** अडविली तर खाज, अंगावर चकंदळे, वांग, सूज, पाण्डु, कुष्ठ, वीसर्प, ज्वर, घशाशी येणे हे विकार होतात.

**उपचार**–जेवण करून वांती, लंघन, रुक्ष व हलके अन्नपान, रेचक, व्यायाम, धूम्रपान व रक्त काढणे.

शुक्रनिरोधजउदावर्तलक्षणम्–मूत्राशये पायौ मुष्कयोश्च शोफो रुजा मूत्रविनिग्रहश्च शुक्राश्मरी तस्य स्रवणं वा ( सुउ. ५५.१५ )

चिकित्सा—अभ्यङ्गाऽवगाहौ, मदिरा चरणायुधभक्षणं, शालिः पयो निरूहो मैथुनं च ( चसू. ७.११ )

**शुक्राचा रोध**—मूत्राशय, गुद, अंड यांत सूज वेदना व लघ्वी अडखळणे-अडणे, शुक्रस्राव, शुक्राश्मरी.

**उपचार**—मैथुन, निरूहबस्ती, अभ्यंग, गरम पाण्यात बसणे. दूध भात, कोंबड्याचे मांस व दारू.

**क्षुन्निरोधजउदावर्तलक्षणम्—तन्द्राऽङ्गमर्दो वैवर्ण्यं दौर्बल्यमरुचिर्विभ्रमो दृष्टेः कृशता च** ( सुउ. ५५.१६ )

चिकित्सा—**स्निग्धोष्णं लघु भोजनम्** ( चसू.७.२० )

**अशक्तता,** डोळ्यापुढे अंधेरी. झापड, अंगदुखी, वर्णाचा बिघाड, तोंड बेचव होणे व किडकिडीतपणा.

**उपचार**—सहज पचणारे हलके स्निग्ध व उष्ण भोजन.

**तृष्णानिरोधजउदावर्तलक्षणम्—कण्ठशोष आस्यशोषः श्रवणावरोधो हृदि व्यथा श्रमः सादश्च** ( सुउ. ५५.१६ )

**चिकित्सा—शीतं तर्पणम् च.** ( चसू. ७.२१ )

**तहान** अडवली तर तोंड व गळा सुकणे, थकवा, आंग गळणे, हृदयात दुखणे व कमी ऐकू येणे. हे उपद्रव होतात.

**उपाय**—पातळ थंड, पौष्टिक द्रव्ये.

**श्वासनिरोधजउदावर्तलक्षणम्—गुल्महृद्रोगसंमोहाः** ( सुउ. ५५.१७ ) **चिकित्सा—विश्रामो वातचिकित्सा च** ( चसू. ७.२४ )

**श्वासाचा** निरोध केला तर हृदयाचे रोग, हृदय, महाशिरा, श्वासमार्ग यांचे गुल्म आणि मूर्च्छा, अंधेरी इत्यादी उपद्रव होतात.

**उपचार**—वाताची चिकित्सा व विश्रांती.

**निद्रानिरोधजउदावर्तलक्षणम्—जृम्भाऽङ्गमर्दस्तन्द्रा शिरोरुगक्षिगौरवं च** ( सुउ. ५५.१७ )

**चिकित्सा—स्वप्नः संवाहनानि च** ( चसू. ७.२३ )

झोपमोड केली तर जांभया, डोळे जड, झापड, डोके दुखणे, अंग दुखणे हे उपद्रव होतात.

**उपचार**—झोप घेणे, अंग दाबणे.

**अपथ्यजउदावर्तलक्षणं संप्राप्तिश्च—कटुकषायतिक्तैर्भोजनैः कुपितः कोष्ठानुगो वायुर्वातमूत्रपुरीषासृक्कफमेदोवहानि स्रोतांसि उदावर्तयति पुरीषं चाऽतिवर्तयति** ( सुउ. ५५.३७–३८ )

**चिकित्सा—रुग्णं तैललवणाऽभ्यक्तं स्नेहस्वेदानन्तरं निरूहयेत् । दोषानुसारं च भोजनानन्तरमनुवासनबस्तिः प्रयोज्यः । यदि एतेनापि शान्तिं न गच्छेत्तर्हि सुदारुणोऽयमुदावर्त इति मत्वा रोगिणं बहुशः स्विन्नं कृत्वा स्नेहविरेचनैर्युञ्ज्यात्** ( सुउ. ५५.४१–४२ )

**अपथ्यज उदावर्त**कारण व संप्राप्ति—कडू, तुरट, तिखट सेवनाने कोष्ठगत अपान वायु, वात, मूत्र, मळ, रक्त, कफ व मेदोवह स्रोतसात ऊर्ध्वगती निर्माण करतो; त्यामुळे अति कठीण व गाठाळ मळ होतो.

**उपचार**—लवणयुक्त तेलाचे अभ्यंग, स्नेहन, स्वेदन, मलहरबस्ति, स्नेहबस्ति, दोषानुरूप भोजन व नंतर अनुवासनबस्ती द्यावा. याने बरे वाटले नाही तर अभ्यंग व घाम काढून स्निग्ध रेचक द्यावे.

**अत्र सर्वेष्वप्युदावर्तेषु वायोः सद्भावात्सामान्येन स्नेहस्वेदनादिका वातनाशन्य एव क्रियाः कार्याः । क्रियाभिश्चैताभिर्वायुरात्ममार्गं प्रतिपद्यते** ( सुउ. ५५.१९ )

सर्व उदावर्तात प्राधान्याने वातप्रकोप होतो म्हणून स्नेहन स्वेदन इत्यादी वातनाशक उपचार मुख्य होत.

**संप्राप्तिर्लक्षणानि च—मुद्गकोद्रवादिरूक्षैः संग्राहिभिः पदार्थैः कुपितो वायुः स्वस्थाने वर्धते तस्माच्च बली भवति । अनेन च कारणेनाऽधोवहानि स्रोतांसि संरुध्य वातविण्मूत्रसङ्गं करोति । ततश्च विविधवातरोगसमुत्पन्ना तीव्रा रुजा भवति आध्मानोदराऽऽवेष्टादिरूपिणी ।** ( असंनि. ७ )

**चिकित्सा—पिप्पल्यादितैलानुवासनं योजयेत्** ( अहचि. ८.८८–९२ )

**उपद्रवाः—आध्मानशूलपुरीषसङ्गपरिकर्तिकादयः । चिकित्सा—यथा स्वं कर्तव्या ।** ( सुउ. ५५.३६; असंसू. ५; अहसू. ४. )

मूग, कोद्रु या सारख्या रूक्ष व मल घट्ट करणाऱ्या आहाराने वायु कुपित होऊन स्वस्थानी वाढतो. बलवान होतो, यामुळे अधोगामी स्रोतसांचा अवरोध व अधोवात, मल, मूत्राचा अवरोध होतो. म्हणून नानाविध वातविषयक पीडा होते. **उपद्रव**—पोट फुगते, ते गुंडाळले आहेसे वाटते, शूळ व गुदात कातरल्यासारखी पीडा होते. **चिकित्सा**—पिप्पल्यादि तैलाचा अनुवासनबस्ती द्यावा व उपद्रवाची दोषानुरूप योजना करावी.

**( उदावर्ता )**—स्त्री., योनिरोग० **उदावृत्ता योनिः**

वेगोदावर्तनान्मारुतो योनिं प्रपीडयति सा पीडितोदावृत्तं फेनिलं रजः कृच्छ्राद्विमुञ्चति
( सुउ. ३८.९ )

आर्तवे विमुक्ते सा तत्क्षणं सुखं लभते
( चचि. ३०.२६ ) ( असंचि ३. )

एक योनिरोग. वायुकोपाने पीडित योनीतून कष्टाने फेसाळ रजस्राव या विकारात होतो. रजस्राव होऊन गेल्यानंतर रुग्णेला तात्पुरते बरे वाटते.

**–विबन्ध**–पु., लक्षण० उदावर्तेन विबन्धः । उदावर्तस्य चाऽत्रामयुक्तत्वादनुवासनसाध्यता न भवति। तदोदावर्तप्रशमनं निरूहः ( चशा. ८.२९ )
उदावर्ताने मलमूत्रांचा विबंध होतो, त्यांची प्रवृत्ति होत नाही. हा विकार आमयुक्त असल्याने अनुवासन-स्नेहबस्ति यावर उपयोगी नाही. निरूहबस्ति उपयुक्त होतो.

**उदावर्तिनी**–स्त्री., योनिव्यापद्० उदावर्ता
( चसू. १९.४ ( ९ )
पहा ' उदावर्ता '

**उदावृत्ता**–स्त्री., योनिरोग० उदावर्ता ( असंउ. ३८ )
( अहउ. ३३.३३–३४ )
पहा ' उदावर्ता '

**उदासीनपरिषद्**–स्त्री., परिषद्० त्रिविधानां परिषदामेकतमा ( चवि. ८.२० )
तीन प्रकारच्या परिषदांपैकी एक परिषद. ज्या परिषदेत आपल्या पक्षाचे किंवा आपल्या विरुद्ध पक्षाचे लोक नाहीत, उदासीन लोक आहेत ती. तटस्थ किंवा निःपक्ष परिषद.

**उदाहरण**–न., दृष्टान्तः ( चसू. ३०.१८ )
दाखला, नमुना.

**उदित**–वि., उक्तम् ( र. ८.६३ )
सांगितलेले. वक्ता व श्रोता या दोघांना मान्य होण्याजोग्या प्रस्तुत विषयाशी जुळता विषयांश.

**उदीच्य**–न., वनस्पति० श्वेतवालकम्, ह्रीबेरः
( सुचि. ३७.३९ )
गुणाः—निर्वापणदीपनीयपाचनीयच्छर्दिहराणां श्रेष्ठम् ( चसू. २५.४० )
पित्तादिज्वरार्तहितजलसंस्कारि ( सुउ. ३९.१०९ )
एक वनस्पती. पांढरा वाळा. दोषशामक, दीपन, पाचन, ओकारीनाशक द्रव्यात श्रेष्ठ आहे. पित्त इत्यादी ज्वरार्ताला पिण्याच्या पाण्यावर संस्कार करणारे द्रव्य.

**उदीरण**–वि., प्रेरकः ( चचि. २८.६० )
प्रेरणा देणे, प्रेरणा देणारा.
न., प्रवर्तनं बहिर्निष्कासनं मलादीनाम्
( चशा. १.१०३ )
मलादिकांना बाहेर टाकणारे, विसर्जक.
(परिव०), उत्कटीकरणम्, वायुस्तेज उदीरयति
( सुशा. ३.४ )
आशयाच्चयवमानस्य पित्तमच्छमुदीर्यते
( चचि. १५.१० )
वाढवणे, उत्पन्न होणे. आशयाच्या शरीरातून स्राव आशयात स्रवणे; आमाशयातून अन्न आल्यावर ग्रहणीत शुद्ध पित्ताचा स्राव होतो.

**उदीरित**–वि., उल्लेखितम्, उत्पाटितम्
( सुनि. १०.१४ )
उल्लेख केलेला, उपटलेला, वर आलेला.

**उदीर्ण**–वि., बहिर्निर्गतः समुत्पन्नः ( चशा. ६.८ )
बाहेर गेलेला, उत्पन्न झालेला, वर आलेला, प्रेरणा दिलेला.

**–ता**–स्त्री., प्रकृतिभूतस्य बलासस्य कर्म, वृद्धिंगतता, उत्साहशीलता ( सुशा. ७.१२ )
प्राकृत कफाचे कर्म. धातूंची वाढ करणे, उत्साह वाढविणे.

**–पित्ता**–(ग्रहणी) वि., स्त्री., लक्षणं० उदीरितं पित्तं यस्यां सा उदीर्णपित्ता ग्रहणी ( चसू. १३.६९ )
एक लक्षण; जिच्यात स्वाभाविक प्रमाणापेक्षा अधिक पित्त वाढले आहे अशी ( ग्रहणी )

**उदुम्बर**–पु. वनस्पति० क्षीरीवृक्ष० यज्ञाङ्गम्, न्यग्रोधादिगणे, धूमपानप्रयोगैकं द्रव्यम् ( चसू. ५.२२ )
मूत्रसंग्रहणीयगणस्थमेकं द्रव्यम् । ( चसू. ४.१५ )
गुणाः—न्यग्रोधादिगणो व्रण्यः संग्राही भग्नसाधको रक्तपित्तहरो दाहमेदोघ्नो योनिदोषहृत्
( सुसू. ३८.४८–४९ )
रूक्षो गुरुर्मधुरस्तुवरोवर्ण्यः ।
निर्वापणालेपनानां श्रेष्ठम् ( असंसू. १३ )
हिं.—गूलर, गुल्हार
म.—उंबर
गु.—उम्बरो, उम्बरडो
बं.—यज्ञ डुमुर
ता.—अत्तिमरम्

एक वनस्पती. क्षीरीवृक्षांपैकी एक. यज्ञातील एक उपयुक्त वस्तू. वड इत्यादी गणातील एक. धूम्र-पानास उपयुक्त व अधिकमूत्रप्रवृत्ती कमी करणाऱ्या वनस्पतींपैकी एक. न्यग्रोधादिगण व्रणाला हितावह, मल घट्ट करणारा, मोडलेले हाड सांधणारा, रक्तपित्तनाशक, दाह-मेदनाशक, योनिदोषहर, रूक्ष, जड, मधुर, तुरट, वर्ण सुधारणारा, लेपादि क्रियेत हितावह आहे.

**रक्तजकृमि०** ( असंनि. १४ )
एक रक्तज कृमि.

न., **कुष्ठ–भेदः पित्तदोषौत्कट्येन भवति** ( सुनि.५.७–८ )

**वेदनादाहरागकण्डूभिः परीतमुदुम्बरफलाभासं पिञ्जरवर्णरोमयुक्तं च दृश्यतेऽस्य रूपम्** ( र. २०.३४ ) ( असंनि. १४ )
एक प्रकारचे कुष्ठ. पित्तदोषाच्या आधिक्याचे कुष्ठ. उंबराच्या फळाच्या रंगासारखे, वेदना, दाह, लाली, खाज यांनी युक्त, केसयुक्त असे असते.

**खनिज० ताम्रम्** ( ध. ६.९ ) तांबे.

**मान० निष्कचतुष्टयमुदुम्बरम्** ( र. ११.४–५ )
एक वजन. चार निष्क. दहा मासे.

**( उदुम्बरी )**–स्त्री., **वनस्पति० काकोदुम्बरिका** ( रा. १.१४२ ) काळा उंबर. खर्वती.

**–क्षीर**–( परिव० )न., **भावनाद्रव्य०** ( र. १६.११–१३ )
**तद्भावितसिद्धतिलानां तैलेन सिद्धः पिचुर्योनिरोगघ्नः** ( चचि. ३०.७७–७८ )
एक भावनाद्रव्य. या दुधाची भावना दिलेल्या तिळाचे तेल. योनिरोगात त्याचा बोळा ठेवल्याने रोगनाशक होते.

**–त्वच्**–( परिव० ) स्त्री., **वानस्पत्य० अत्यग्निशान्त्यर्थ-मुपदिष्टा** ( चचि. १५.२३० ) उंबराची साल.
**भस्मक रोगात**–खा खा सुटते त्यात उपयुक्त.

**–दला**–स्त्री., **वनस्पति० दन्ती** ( रा.६.३३९ ) दांती.

**–पर्णी**–स्त्री., **वनस्पति० दन्तीपर्यायः** ( चक. १२.३ )
दांतीचा प्रकार.

**–पल्लव**–( परिव० ) पु., **शाक० कषायाः स्तम्भनाः शीताः पित्तातिसारिणां हिता उदुम्बरपल्लवाः** ( चसू. २७.१०५ )
उंबराची पाने, तुरट, स्तंभक व थंड. कोवळ्या पानांची भाजी करितात. पित्तातिसारावर उपयुक्त.

**–फल**–न.,**उदुम्बरस्य पक्वं फलं रक्तपित्तशमनम्** ( सुउ. ४५.२३ )
**अस्य रसः सर्वतृष्णाशमनः** ( सुउ. ४८.२२–२३ )
उंबराचे फळ. पिकलेले फळ. रक्तपित्ताचे शमन करते. याचा रस सर्व प्रकारची तहान नाशक आहे.

**–भस्मन्**–( परिव० ) न., **उदुम्बरकाष्ठाणि दग्ध्वा कृतं भस्म । एतद्धिक्काशमनार्थं मधुघृतयुतं लेहयेत्** ( सुउ. ५०.२० )
उंबराची लाकडे जाळून केलेले भस्म. हे उचकी थांबवण्याकरिता उपयुक्त आहे. अनुपान-मध व तूप.

**–शलाका**–( परिव० ) स्त्री., **ताम्रमयी शलाका एषा लेखने उपयुज्यते** ( सुउ.१८.६३ ) तांब्याची सळई. ही दोष खरडून काढण्याची क्रिया करते.

**–शलाटु**–पु., **वानस्पत्य० आममुदुम्बरफलम् । आजेन पयसा सहैतस्मिन् पीते सति गर्भः स्थिरीभवति** ( चशा. ८.२४ )
उंबराचे कच्चे फळ. गर्भस्राव, गर्भपात यांची खोड असलेल्या स्त्रीला उपयुक्त. बकरीच्या दुधाबरोबर घेतले असता गर्भ स्थिर होतो.

**–सम**–वि., **कर्षप्रमाणम्** ( सुउ. ५८.३८ )
**उदुम्बरफलप्रमाणम्** ( डसुचि. २६.२९ )
उदुंबराइतके. एक वजन. दहा मासे.

**–समिध**–( परिव० ) स्त्री., **उदुम्बरोद्भवा समिध्** ( चशा. ८.१० )
उंबराची समिधा. होमाकरिता उपयोगी. उंबराच्या डाहळीचा तुकडा.

**उदुम्बरादिचूर्ण**–न., **उदुम्बरमूलचित्रकनिम्बबाकुचीनां चूर्णम्** ( र. २०.२२६ ) एक मिश्र चूर्ण. उंबराचे मूळ, चित्रक, निंब व बावची यांचे चूर्ण.

**उदूखल**–पु., न., **उलूखलः** (चचि. १.७५) उखळ, खल.
**संधिप्रकार० कक्षावङ्क्षणदशनेषूदूखलाः संधयः तत्र कक्षावङ्क्षणेषु चेष्टावन्तो दशनोदूखलास्तावत्स्थिराश्च** ( सुशा.५.२७–२८ ) सांध्याचा एक प्रकार. काख, जांघ, व दात यांचे सांधे उखळाच्या जातीचे असतात. खळग्यासारखे. यात काख व जांघेतील सांधे चल व दातांचे अचल असतात.

**उद्गत**–वि., **स्वस्थानादूर्ध्वं गतम्** ( सुनि. १५.१० )
स्वतःच्या स्थानाच्या वर आलेले, वर गेलेले.

**–मृत्युकल्प**–वि., **उपस्थितमृत्युसमः** (सुउ. २५.१८)
मृत्यूच येऊन उभा आहे असा. मृत्यूच आल्या-सारखा.

**उद्गताक्ष**–वि., लक्षण० **उद्गते अक्षिणी नेत्रे यस्य सः** (सुचि. ३४.१९) एक लक्षण. बाहेर आलेल्या डोळ्याचा. टपोऱ्या डोळ्याचा.

**उद्गातृ**–पु., **सामवित्** (सुसू. ३४.१७) सामवेदाचा ज्ञाता. सामवेद म्हणणारा.

**उद्गार**–पु., लक्षण० **बहिर्गतिस्रावप्रादुर्भावप्रवाहभाषणादिबह्वर्थकोऽयं शब्दविशेषः, उद्गतस्य वायोर्मुखान्निःसरणमुद्गीरणम्** (सुसू. २६.१३) एक लक्षण. तोंडातून निरनिराळ्या क्रियांसह वायु बाहेर जाणे. तोंडातून स्राव उत्पन्न होऊन बाहेर पडणे. भाषण, ढेकर असे अनेक अर्थ आहेत. येथे ढेकर असा अर्थ आहे.

**–निग्रह**–पु., लक्षण० **उद्गारविनिग्रहः** (चसू. ७.१८) येऊ पहाणारी ढेकर येऊ न देणे. येणारी ढेकर अडविणे.

**–बाहुल्य**–न., लक्षण० **ऊर्ध्ववातः** (सुनि. २.८) सारख्या ढेकरा येणे. नित्यापेक्षा स्वाभाविक प्रमाणापेक्षा अधिक ढेकरा येणे.

**–विघातन**–न., लक्षण० **आमसमुद्भवाऽऽनाहलक्षणम्। उद्गारस्याऽऽसम्यक् प्रवृत्तिः** (सुउ. ५६.२१–२२) आमाने होणाऱ्या आनाह रोगाचे एक चिन्ह. ढेकर नीट न येणे. ढेकर येते आहे असे असताना मध्येच ती थांबणे. पुरी ढेकर न येणे.

**–विनिग्रह**–पु., लक्षण० **उद्गारस्याऽप्रवृत्तिः वातज्वरस्यैकं लक्षणम्** (चनि, १.२१) ढेकर चांगली न येणे, वातज्वराचे लक्षण. पहा 'उद्गारविघातन.'

**–विशुद्धि**–स्त्री., लक्षण० **शुद्धवातस्योद्गारः जीर्णान्नस्य लक्षणम्। आहारग्रहणयोग्यकालस्य सूचकं लक्षणमेतत्** (असंसू. २५) **मधुराम्लधूमगन्धरहितोद्गारः** (सुउ.६४.८४)(परिव) शुद्ध ढेकर येणे. अन्न जिरल्याचे, तसेच भूक लागल्याचे, आहार घेण्याची वेळ आहे असे दाखविणारे लक्षण. गोड, आंबट, तिखट इत्यादी रस किंवा कोणताही वास व धुरकट नसलेली ढेकर.

**उद्गिरण**–(परिव०) न., लक्षण० **वमनम्, उद्गारः** (सुउ. ४०.१७४) घशाशी येणे, ओकारी होणे, ढेकर येणे.

**उद्-घर्षण**–न., **अस्नेहौषधचूर्णादिभिर्घर्षणम् फेनकेष्टकादिभिर्वा, तद्गुणाः–सिरामुखविविक्तत्वं, त्वक्स्थस्याऽग्नेस्तेजनं, कण्डूकोठानिलापहं, मलरोगापहम्, फेनकः ऊर्वोः स्थैर्यलाघवे आशु संजनयति** (सुचि. २४.५३–५६) रूक्ष शुष्क चूर्णादिकांनी त्वचा घासणे चोळणे. समुद्रफेस, वीट वगैरेंनी घासणे. याचे **गुण**–शिरांची तोंडे मोकळीं होणे, कंडू, शीतपित्ताचा कफज प्रकार व वात नाहीसा होणे, त्वचेचा मळ नाहीसा होणे ही कार्ये उद्घर्षणाने होतात. मांड्यांचे स्थैर्य व हलकेपणा समुद्रफेसाच्या घासण्याने येतो.

**उद्-घाटन**–न., **उत्थापनम्, सुवर्णत्वादिप्राप्तस्य ताम्रादिलोहद्रव्यस्य पारदेन मलिनतानिवारणमुत्कृष्टवर्णतानयनं च। लोहे तदेकीभूते च सूते दशांशेन चूर्णप्रक्षेपणम्।** **'उत्थापनम्' इत्यपरपर्यायम्** (र. ८.९५) ताम्रादिधातूंना सुवर्णत्व प्राप्त झाल्यावर त्या सिद्धद्रव्याची मलिनता पाऱ्याच्या साह्याने नाहीशी करून उत्कृष्ट वर्ण निर्माण करणे. लोहात आणि त्यात मिसळलेल्या पाऱ्यात एक दशांश चूर्ण घालणे.

**उद्दानक**–पु., वनस्पति०–**शिरीषः** (रा.९.१८९) शिरस.

**उद्दालक**–पु., वनस्पति० **शूकधान्यभेदः, आरण्यकोद्रुः, बहुवारः, तद्गुणाः–त्वग्दोषिभिः सेव्यम्, पुराणाः प्रमेहे पथ्याः षष्टिकाल्पान्तरगुणाः, स्थौल्ये उपयुज्यमानः उद्दालकस्तु वीर्येणोष्णो लेखनो वातलो लघुः रूक्षः स्वादुः कषायः श्लेष्मजिद्बद्धमूत्रविट् च** (सुचि. ९.५) **रक्तपित्तकरः** (चनि. २.४) एक वनस्पती. रानकोद्रु, रानहरिख. हा जुना वापरावा; प्रमेह, स्थूलता त्वचादोष यांवर उपयुक्त. रक्तपित्त उत्पन्न करणारा आहे. साठे साळीहून गुणाने कमी, उष्ण, लघु, रूक्ष, मधुर, तुरट, लेखन, वातकर, कफनाशक, मलमूत्रअवरोधक.

**उद्दालकान्न**–न., **उद्दालकेन सिद्धमन्नम्। विरूक्षणीयानां श्रेष्ठम्।** (चसू. २५.४०) कोद्रूने सिद्ध केलेले अन्न, कोद्रूचे निरनिराळे तयार केलेले प्रकार. शरीर रूक्ष करणाऱ्या द्रव्यांत श्रेष्ठ.

**उद्दालन**–न., **प्रशमनम्** (चचि.७.१६०) शामक, नाशक.

**उद्दिष्ट**–वि., **संक्षेपेण कथितम्** (चवि. २.६) संक्षेपाने सांगितलेले.

**उद्देश**–पु., **संक्षेपाऽभिधानम्** (चक. १.१२; चसि. १२.४२) संक्षेपाने सांगणे. **प्रदेशः** (सुचि. २९.३०) प्रदेश, स्थान. **नामकथनम्** (चसू. १९.४) नाव सांगणे.

**उद्धत**–( वि. ) **वृद्धम्, विपुलम्** ( चवि. ८.१०४ )
वाढलेला, पुष्कळ.
**प्रकुपितः** ( सुचि. ९.४२ ) प्रकुपित झालेला.

**उद्धरण**–न., **ग्रन्थवचनस्योल्लेखः** ( असंसू. ३४.२३ )
ग्रंथातील वचनाचा उल्लेख करणे. वचनाचा आधार देणे.

**उद्धस्त**–वि., **विकृतदर्शनः, ऊर्ध्वहस्तः** ( सुउ. ६०.१५ )
विकृतीचे दर्शन. हात वर केलेला.

**उद्धार**–पु.,तन्त्रयुक्ति० **परपक्षदूषणं कृत्वा स्वपक्षोद्धरणम्** ( चसि. १२.४५ )
ग्रंथ लावण्याची एक युक्ति. दुसऱ्या पक्षातले दोष दाखवून आपला पक्ष मांडणे, प्रतिपादन करणे.

**उद्धूयमान**–वि., **लक्षण० ऊर्ध्वगमनप्रवृत्तम्**
( चचि. १७.४६ ) वर जाण्याला तयार असलेला–झालेला. वर उचलण्यासारखा.

**उद्धूलन** न., **चूर्णानामूर्ध्वक्षेपणम्, चूर्णप्रलेपनं च**
( सुउ. ६०.५३ ) शरिरावर चूर्ण उधळणे, चूर्णाचा छिटकारा मारणे, छिटकणे. लेप लावणे.

**उद्धृत**–वि., **बहिर्निष्कासितम्** ( सुशा. ९.१२ )
बाहेर काढलेले. वर काढलेले.

**–शल्य**–वि., **स्रोतोविद्धस्य शल्यमुद्धृतम्**
( सुशा.९.१२ ) ज्याच्या शरिरात असलेले–घुसलेले शल्य काढले आहे असा. मुक्तशल्य.

**–स्नेह**–वि., **मन्थनेन यस्य स्नेहो नाम घृतमुद्धृतं तद्** ( सुचि. २४.९९ )
स्नेह काढलेले, लोणी काढलेले ( ताक. )

**उद्धृतास्थि**–वि., उद्धृतान्यस्थीनि **( बीजानि ) यस्मात्स आमलकादिः** ( चचि. १ ( ३ ) ३ )
आठोळी काढलेले आवळा इत्यादी. बी काढलेले.

**उद्ध्वंसन**–न., **उपघातः स्वरसादः यथा भवति तथा**
( चनि. ६.४ ) बिघाड, आघात, स्वरसाद झाला असता घशात जसा बिघाड होतो तसा.

**उद्बद्ध**–वि., **उपरिबद्धः यथा मारणार्थं गले बद्धः पाशः**
( र. २३.२९ ) वर बांधलेला. फांशी देताना गळ्याला फास लावतात तसा बांधलेला.

**उद्बन्ध**–पु., **वधार्थमुपयुक्ता गलबन्धकारिणी रज्जुः; एवंविधया रज्वा मरणं वा** ( चचि. २३.५३ )
फाशी देण्याकरिता गळ्याला बांधावयाची दोरी. फाशीने आलेला मृत्यु.

**–मृत**–वि., **उद्बन्धेन मृतः** ( चचि. २३.२४९ )
फाशीने मेलेला; फास लावून मेलेला,

**उद्बन्धक**–वि., **गलबन्धेन मृतकल्पः** ( असंउ. ८ )
फाशीने मेल्यासारखा, फाशीने मृतवत.

**उद्भिज्ज**–वि., **भुवमुद्भिद्य जाता वनस्पतयः, इन्द्रगोप मण्डूकप्रभृतय उद्भिज्जाः** ( सुसू. १.३० )
जमीन फोडून उत्पन्न होणाऱ्या वनस्पती. वीरबहुटी, ( मृगकिडा ) बेडूक इत्यादी प्राणी.
**औद्भिद** ( परिव० ) न., **लवण० रोमकलवणम्, द्रष्टव्यं रोमकलवणम्** ( ध. २.३२ )
ओलसर जमिनीतून वर आलेले साचलेले मीठ; सांबर सरोवराच्या पाण्यापासून झालेले मीठ. रोमक. पहा 'रोमक'

**उद्भिद**–न., **निम्नप्रदेशात् ऊर्ध्वोत्तिष्ठज्जलस्थानम्**
( सुसू. ४५.४ ) जमिनीतून उसळून वर येणारे पाणी. तळातला झरा.
**शाक० छत्राकम् तच्च पञ्चप्रकारकम् पलालजातम् इक्षुजातम् कारिषं वेणुजातं भूमिजं च**
( सुसू. ४६.२९३ )
भाजीचा एक प्रकार. ही पाच प्रकारची ( १ ) पेंढा कडबा यांवर उत्पन्न होणारी ( २ ) उसावरची ( ३ ) शेण्या किंवा गोवऱ्यांवरची ( ४ ) बांबूवरची आणि ( ५ ) जमिनीवर उत्पन्न होणारी.

**उद्भिन्न**–वि., **विकसितम्** (सु. ४७.६३) विकसित; फुललेले.

**उद्भीषण**–वि., **भयोत्पादकम्** ( चशा. १.११९ )
भीषण, भीतिदायक. भय उत्पन्न करणारे.

**उद्भ्रान्त**–वि., **( दोषः ) उन्मार्गगामी** ( चवि. ८.४ )
चयप्रकोप स्थानातून बाहेर पडलेला; प्रसरावस्थेला गेलेला. पसरणारा; मर्यादेचे अतिक्रमण केलेला.
वि., **इतस्ततः पलायनपरः** ( चवि. ३.३६ )
इकडे तिकडे पळणारा. वाट फुटेल तिकडे जाणारा, पळणारा.

**उद्यान**–न., **उपवनम्** ( असंसू. ४ ) बाग, उपवन, बगीचा.

**–दीर्घिका**–स्त्री., **क्रीडावनवापी** ( अहसू. १३.८ )
क्रीडेकरितां खोदलेली–बांधलेली विहीर, किंवा तळे. पोहोण्याची विहीर किंवा तळे.

**उद्र**–पु., **पानीयबिडालः कूलचरवर्गीयः** ( सुसू. ४६.९४ )
पाणमांजर.

**उद्रिक्त**–वि., **अधिकम्** (अहसू. ६.५८) अधिक वाढलेला.

**उद्रेक**–पु., **अकालप्रवृत्तिः** ( सुचि. ३७.१२५ )
अकाली प्रवृत्ती. अकाली रजःस्राव.
**प्रकोपः आधिक्यम्** ( सुउ. ४१.८ )
अधिकता, प्रकोप, वाढ,

वनस्पति० महानिम्बः ( रा. ९.४६ )
महानिंब, बकाणनिंब.

**उद्रेकिन्**–पु., **वनस्पति० महानिम्बः** ( ध. १.३१ )
बकाणनिंब, मोठा निंब.

**उद्वम**–पु., **छर्दनम्** ( अहृसू. ४.१८ ) उलटी, वांती.

**उद्वर्तनम्**–न., **गात्रमर्दनम् (द्रव्यं क्रिया च) १ ) त्वगवघर्षणम् २ ) स्नानात्पूर्वं त्वगवघर्षणार्थमुपयुज्यमानं चूर्णम् आमलक्यादि; कफहरं मेदसः प्रविलापनं त्वक्प्रसादनकरमङ्गानां च स्थिरीकरणमुद्वर्तनम् ३ ) पादाभ्यामङ्गावयवानां पीडनं येन व्यायामजनितः श्रमः शाम्यति ।** ( र. २०.७६ )
( सुचि. २४.५१ )
( १ ) अवयवांचे मर्दन, रगडणे, चेपणे, चोळून चोळून लावणे ( २ ) उटणे. ( ३ ) कातडी चोळणे, घासणे. ( ४ ) स्नानाच्या पूर्वी कातडी घासण्याकरिता योजलेले आवळकटी इत्यादी चूर्ण. **गुण**– कफहर, मेद विरघळवणारे, त्वचा सुंदर करणारे, सर्व अवयवांना स्थैर्यकर, पायांनी दुसऱ्याकडून अंग चेपून घेण्याने व्यायाम किंवा श्रमाने आलेला थकवा जातो. ह्या क्रियेलाही उद्वर्तन म्हणतात.

**उद्वहन**–न., **इन्द्रियार्थानां धारणं, वायोरुदानस्य कर्म** ( सुसू. १५.४ ( १ ) इंद्रियाच्या अर्थाचे धारण करणे. उदान वायूचे हे कर्म आहे.

**उद्वामिन्**–वि., **यः फेनपूयरुधिरादीनि उद्वमति; एतच्च रिष्टलक्षणम्** ( सुसू. ३२.४ )
जो रक्त, पू, फेस इत्यादी ओकतो तो. हे मरणाचे लक्षण आहे.

**उद्विग्न**–वि., **चलितः. हृष्येन् मयूर उद्विग्न इत्यत्रोद्विग्नश्चलितः मयूरो हृष्येत्तुष्येदित्यर्थः**
( सुक. १.३१–३२ ) चालणारा. नाचणारा. विषयुक्त अन्न पाहून मोराला आनंद होतो.
**भीतः** ( सुसू. २९.७–८ )
भ्यालेला, खिन्न, दुःख किंवा शोकयुक्त.

**उद्वृत्त**–वि., **परावृत्तमुखः** ( चसि. ९.४४ )
वर चढलेला, वर उचलून आलेला, फुगल्यामुळे वर उन्नत दिसणारा.

**–फल**–वि., **स्थानादूर्ध्वगताण्डः** ( सुसू. ११.१८ )
नित्याच्या स्थानापेक्षा वरच्या बाजूस चढलेले अण्ड असलेला.

**–फलयोनि**–वि., **स्थानादूर्ध्वगतगर्भाशया**
( सुसू. ११.२८ ) ( असंसू. ३९.५ )
आपल्या स्थानापेक्षां वर उचललेला गर्भाशय जिचा आहे अशी स्त्री.

**उद्वृत्तौष्ठ**–वि., **उत्सन्नवर्त्मा व्रणः** ( सुसू. २३.१२ )
ज्याचे ओठ–कडा वर उचलून आल्या आहेत असा. ( व्रण )

**उद्वेग**–पु०, **मनोविकार० अरतिः, अनवस्थितिश्चेतसः**
( चनि. ७.४ )
मानसिक विकार, खिन्नता, नकोसे वाटणे, तिटकारा, बेचैनी. मनाची अस्थिरता. उदासीनता. क्रोध व निराशा यांचे मिश्रण. मन विटणे.
न., **वनस्पति० पूगफलम्** ( ध. ३.३९ )
एक वनस्पती, सुपारी.

**उद्वेजन**–न., **ग्रहोपसृष्टलक्षणेष्वेकम् उद्वेगः, पीडा भीतिः** ( सुशा. १०.५१ )
ग्रहपीडेचे एक लक्षण. उद्वेग, भीती, तिटकारा, व्याकुळता, उदासीनता. पहा 'उद्वेग.'

**उद्वेजनीय**–वि., **व्याकुलचित्तताजननी कथा**
( सुशा. १०.३ ) उद्वेग निर्माण करणारी ( कथा. )

**उद्वेपक**– पु., **वेपथुः, कम्पः** ( चवि. ८.९८ ) कांपरें.

**उद्वेष्टन**–न., **रोगलक्षण० वेष्टितवत् वेदना, अङ्गमोहनम्, अङ्गस्य ग्रथनमिव** ( सुचि. ३६.४५, असंउ ४३ )
एक रोगलक्षण. वेढल्याप्रमाणे, आवळल्याप्रमाणे, बांधल्याप्रमाणे, ठेचल्याप्रमाणे वेदना.

**उन्दुक**–पु., न., **उण्डुकः, रक्तकिट्टात् उन्दुकः**
( असंशा. ५.४८ )
**मलाधारः** ( सुशा. ४.१७ )
मलाशय. रक्त व किट्ट यांपासून उण्डुकाची उत्पत्ति झाली. मोठ्या आंतडीचा डाव्या बाजूच्या नाभिरेषेपर्यंतचा म्हणजे पक्वाशयापर्यंतचा भाग.

**उन्दुर**–पु., **मूषकः** ( असंसू. ८.११८ ) उंदीर.

**–कर्णिका**–स्त्री., **वनस्पति० आखुकर्णी**
( रापरि. ३.२१ ) उंदिरकानी
**द्रवन्ती** ( डसुसू. ३८.१८.१९ ) दांती.
**दन्तिनी** ( डसुसू. ३८.१८.१९ ) दांती.

**उन्दुरु**– पु., **उन्दुरः** ( सुक. ७.३६ ) उंदीर.

**उन्द्र**–पु., **उद्रः, पानीय–बिडालः** ( सुचि. ४.१७ )
पाणमांजर.

**उन्नमन**–न., **शरीरान्तर्भागे प्रविष्टस्याऽधः–स्थितस्य शरकर्णादेरूर्ध्वीकरणमेतद्यन्त्रकर्म** ( सुसू. ७.१७ )
एक यंत्र कर्म. शरिराच्या अंतर्भागात घुसलेल्या व खालच्या भागात असलेल्या शल्यास वर उचलणे,

**उन्नति**–स्त्री., उत्सेधः ( अहृसू. २२.१५ )
मुखावर करावयाच्या लेपाची जाडी, उंची.

**उन्नहन**–न., उन्नाहः **ऊर्ध्वीकरणम् तच्चानामितसंधि-मुक्तकाण्डभग्नानां प्रतीकारोपायः** ( डसुचि. ३.१७ )
वर उचलणे. झुकलेल्या सांध्यातून सुटलेल्या हाडाचे कांडे फुटले असेल तर त्याचा एक उपाय.

**उन्निद्रता**–स्त्री., लक्षण० **निद्राराहित्यम्** ( असंनि. २ )
निद्रानाश, झोप नसणे.

**उन्मत्त**–वि., **वातुलः** ( सुक. ३.४३ ) वातप्रकृतीचा.
**उन्मादरोगयुक्तः** ( चशा. ३.१५ )
उन्माद रोगाने व्याप्त.
पु., **वनस्पति० धत्तूरः** ( रा. १०.११ )
धोतरा, एक वनस्पती.

**–चित्तत्व**–न., **उद्भ्रान्तचित्तत्वम् उन्मादपूर्वरूपम्** ( चनि., ७.६ ) उन्मादाचे पूर्वरूप, अस्थिरचित्त असणे. व्यथित मन असणे.

**–उन्मत्ताख्यरस**–पु., **योग० समभागौ पारद-गन्धकौ धत्तूरफलजद्रवेण मर्दयित्वा पुनश्च त्रिकटुना सह मर्दयेत् । रसोऽयं सन्निपाते नस्यार्थमुपयुज्यते** ( र. १२.११५–११६ )
एक पारदयोग. सन्निपात ज्वरामध्ये नाकात घालण्याकरिता उपयोगात आणतात. पारद व गंधक समभाग घेऊन धोत्र्याच्या फळाच्या रसात व नंतर सुंठ, मिरे, पिंपळी बरोबर मर्दन करणे.

**उन्मत्तक**–पु., **धत्तूरः** ( र. २३.५ ध. ४.७ ) धोतरा.

**उन्मद**–पु., **रोग० उन्मादः** ( र. १२.९९ )
उन्माद रोग.

**उन्मन्थ**–पु., **कर्णामय० कफवातजोऽयम्** ( सुचि. २५.३ )
**स्वरूपम्–कर्णे दुर्विद्धे सति पाल्यां वायुः प्रकुप्यति, कफसहितश्च कफवर्णवेदनं शोफं करोति** ( सुचि. २५.७ )
**अयं विकारः सकण्डूकः** ( सुचि. २५.८ )
**स्थिरः स्तब्धो भवति** ( असंउ. २१ पृष्ठ १५२ )
**चिकित्सा–तालपत्र्यश्वगन्धार्कबाकुचीफलसैन्धव–सरलालाङ्गलीभिः कुलीरवसयाऽथवा गोधावसया सहितं पाचितं तैलमुन्मन्थनाशकं भवति** ( सुचि. २५.१८–२१ )
कानाचा एक रोग. कफवातज रोग. कान नीट न टोचल्यास सकफ वायु कानाच्या पाळीवर सूज निर्माण करतो. ही सूज, स्थिर, स्तब्ध, जाड, पांढरट, खाजयुक्त असते **चिकित्सा**–मुसळी, आस्कंद, रुई, बावची, गेळफळ, सैंधव, देवदार व कळलावी, घोरपडीची चरबी यांसह तेल सिद्ध करून उपयोग करावा.

**उन्मन्थक**–पु., **उन्मन्थः** ( चशा. ८.३२ ) 'उन्मथ' पहा.

**उन्मर्दन**–न., उपक्रम० **हस्ततलेन मर्दनम्** ( चशा. ८.३२ ) हाताच्या तळव्याने मर्दन करणे.

**उन्माद**–पु., **मानसरोग० प्रवृद्धा दोषा मनोवहस्रोतांसि प्राप्ताः सन्तः यस्मान्मनो भ्रमयन्त्यतोऽयं मानसो व्याधिरिति सम्बन्धः** ( सुउ. ६२.३ )
**उत्पत्तिकथा–तस्मिन् हि दक्षाध्वरध्वंसे देहिनां भयत्रासशोकैरुन्मादानामुत्पत्तिरभूत्** ( चवि. ८.११ )
**सामान्यलक्षणम्–उन्मादो नाम मनोबुद्धिसंज्ञा-ज्ञानस्मृतिभक्तिशील–चेष्टाचारविभ्रमः** ( चनि. ७.५ )
**निरुक्तिः–उन्मादः यः शारीर–मानसैरुन्मार्गदोषैः मनसो मदः** ( असंउ. ९ पृष्ठ ७२ )
उन्माद. एक मानसिक रोग. वाढलेले दोष मनोवह स्रोतसांचा क्षोभ करून मनाला भ्रमिष्ट करून हा रोग निर्माण करतात. यज्ञविध्वंसामुळे मानवाचे ठिकाणी भय, व शोक होऊन हा विकार झाला.
**लक्षण**–मन, बुद्धि, संज्ञा, ज्ञान, स्मृति, भक्ति, शील, चेष्टा, आचार यांचा विभ्रम म्हणजे विपरीत बदल होऊन त्यात आधिक्य सातत्य व वेग निर्माण होतो.
**सामान्यहेतवः सम्प्राप्तिश्च–विरुद्ध–दुष्टाऽशुचि-भोजनानि देवगुरुद्विजादीनां प्रधर्षणं, विषमा-श्चेष्टा भयहर्षादिपूर्वो मनोऽभिघातः, एतैरल्पसत्वस्य प्रदुष्टा मला बुद्धेर्निवासं हृदयं प्रदूष्य मनोवहानि स्रोतांस्यधिष्ठाय नरस्य चेत आशु प्रमोहयन्ति** ( चचि. ९.४–५ )
कारणे–मन मूळचेच अबल असणे, विरुद्ध, बिघडलेले अपवित्र अन्न खाणे, देव, गुरु, ब्राह्मण इत्यादी पूज्य श्रेष्ठ अशा महान् व्यक्तींचा अपमान करणे, यांच्याशी द्वेष धुमसत ठेवणे, नेहमी वेडे वांकडे बसणे व हालचाल करणे, भय, अति आनंद इत्यादी कारणांनी मनावर आघात होणे.
**संख्या सम्प्राप्तिः–पञ्चोन्मादा भवन्ति वात-पित्तकफसंनिपातागन्तुजभेदात्** ( चनि. ७.३ )

मनोऽभिघातात्षष्ठः (सुउ. ६२.४–५)

पूर्वरूपाणि–शिरःशून्यता, चक्षुराकुलता, कर्णयोः स्वनो हृद्रह उच्छ्वासाधिक्यमास्यस्रावोऽनन्नाभिलाषाऽरोचकाऽविपाकावस्थाने ध्यानायाससंमोहोद्वेगाश्च सततं लोमहर्षोऽभीक्ष्णं ज्वर उन्मत्तचित्तत्वमुदर्दित्वं व्याधेरर्दिताकृतिकरणं, स्वप्ने भ्रान्तचलितानवस्थिताऽप्रशस्तरूपाणां दर्शनं तैलयन्त्रारोहणं वातकुण्डलिकाभिरुन्मथनं कलुषजलावर्ते निमज्जनं चक्षुषोश्चाऽपसर्पणम् इत्येवमादीनां स्वप्ने दर्शनम् । ( चचि. ७.६ )

**पूर्वरूपे**–डोके सुन्न होणे, डोळे व्याकुळ होणे, कानात आवाज, हृदय जखडणे, श्वसन क्रिया वाढणे, तोंडातून लाळ गळणे, भूक नसणे, अरुची, अपचन, निष्कारण चिंतन, श्रम, काही न सुचणे, सर्व गोष्टींचा तिटकारा, सतत अंगावर शहारे येणे, सारखा ताप, चित्त उन्मत्त होणे, अंगावर चकंदळे येणे, चेहरा रोगट होणे, स्वप्नात हलणारी, चंचल, अप्रशस्त दृश्ये दिसणे, तेलघाण्यावर बसलो, वाऱ्याच्या भोवरीबरोबर गरगर फिरतो, गढूळ पाण्याच्या भोवऱ्यात बुडालो, डोळे गेले इ. दृश्ये दिसणे.

**प्रकार**–पांच. वातज. पित्तज, कफज, सन्निपातज आणि आगन्तु. सुश्रुताने मनाच्या अभिघाताने होणारा सहावा प्रकार मानला आहे.

सामान्यलक्षणानि–धीविभ्रमः सत्वपरिप्लवः पर्याकुलादृष्टिरधीरताऽबद्धवाक्त्वं शून्यं हृदयं तथा च मूढचेताः सन् सुखदुःखे, आचारधर्मौ न जानाति तेन चाऽशान्तः सन् अपास्तस्मृतिबुद्धिसंज्ञ इतस्ततो भ्रमति ( चचि. ९.६–७ )

बुद्धि चळलेली दिसते, मन विकृत व आकुल आणि अधीर वाटते. दृष्टि गढूळ, ग्रस्त व क्षुब्ध दिसते, अडखळत बोलणे, हृदय भावनाविरहित, शून्य, मनाला कांही सुचत नाही. यामुळे सुख दुःख, आचार विचार समजत नाही. नेहमी अशांत असतो. स्मृति बुद्धि ज्ञान कमी झालेले असते, अशा अवस्थेत इकडे तिकडे फिरत असतो.

वातजोन्मादलक्षणम्–परिसरणमजस्रमकस्मादक्षिभ्रुवौष्ठांसहन्वग्रहस्तपादाङ्गविक्षेपणं, सततमनियतगिरामुत्सर्गः । फेनागमनं स्यात्, स्मितहसितनृत्यवादित्रसंप्रयोगाश्चाऽस्थाने, वीणावंशशम्यातालशब्दानुकरणमुच्चैरयानैर्यानम् अभूषणद्रव्यैर्भूषणमलब्धाभ्यवहार्येषु लोभो, लब्धेषु चावमानस्तीव्रं मात्सर्यं च । कार्श्यं, पारुष्यमुत्पिण्डिताऽरुणाक्षिता वातोपशय-विपर्यासाऽनुपशयिता च ( चनि. ७.७ ( १ )

**वातज उन्मादाची लक्षणे** सारखे फिरणे. डोळ्याच्या भुवया, ओठ, खांदे, हनुवटी, हात पाय उडवणे, सतत अनियमित बडबड, फेस येणे, अकारण हसणे, नाचणे, वाद्ये वाजविणे, वीणा, बासरी, डाव्या उजव्या हाताने झांज टाळ यांच्यासारखे वाजवणे, वाहन नसलेले वाहन समजून त्यांवरून भरधाव जाणे, अलंकार नसलेलेही पदार्थ अलंकारा सारखे घालणे, जे मिळण्यासारखे नाही त्याचा लोभ, मिळते तें नाकारणे, अतिशय मत्सर, कृशता, रखरखितपणा, डोळे लालसर, व बाहेर आल्यासारखे वाटणे, वातशामक द्रव्यांनी बरे वाटणे व वातवर्धक द्रव्यांनी त्रास अधिक वाढणे.

पित्तजोन्मादलक्षणम्–अमर्षः, क्रोधः, संरम्भश्चाऽस्थाने, शस्त्रलोष्टकशाकाष्ठमुष्टिभिरभिहननं स्वेषां परेषां वा, पलायनं, प्रच्छायशीतोदकाऽन्नाभिलाषोऽतिवेलं सन्तापस्तापस्ताम्रहरितहारिद्रसंरब्धाक्षिता पित्तोपशयविपर्यासाऽनुपशायिता च ( चनि. ७.७. ( २ )

**पित्तज उन्माद लक्षणे** अस्थानी मत्सर, क्रोध, दांडगाई. शस्त्र, ढेकूळ, चाबूक, काठी, मूठ यांनी स्वतःच्या लोकांना किंवा दुसऱ्याना मारणे, पळणे, छाया, थंड अन्नपाणी यांची इच्छा, पुष्कळ वेळ संताप असणे, ताप येणे, लाल हिरवे पिवळे व त्रस्त डोळे, पित्तशामक द्रव्यांनी बरे वाटणे व पित्तवर्धक द्रव्यांनी त्रास वाढणे.

कफजोन्मादलक्षणम्–स्थानमेकदेशे, तूष्णींभावोऽल्पशश्चंक्रमणं, लालासिंघाणस्रावोऽनन्नाभिलाषो रहस्कामता बीभत्सत्वं, शौचद्वेषः, स्वप्ननित्यताऽऽनने श्वयथुः, शुक्लस्तिमितमलोपदिग्धाक्षित्वं, श्लेष्मोपशयविपर्यासाऽनुपशयिता च ( चनि. ७.७ ( ३ )

सांनिपातिकजोन्मादलक्षणम्–त्रिदोषलिङ्गसंनिपाते तु सांनिपातिको ज्ञेयः ( चनि.७.७ )

**कफज उन्माद लक्षणे**–एके ठिकाणी स्तब्ध रहाणे, थोडे फिरणे, लाळ, शेंबुड गळणे, अन्नाची इच्छा न होणे, एकांत बरा वाटणे, किळसवाणे हावभाव करणे, स्वच्छतेचा तिटकारा, झोपाळूपणा, तोंडावर सूज, पांढरे थिजलेले मळयुक्त असे डोळे, कफशामक उपचारांनी बरे वाटणे, व कफवाढव-

णाऱ्या द्रव्यांनी विकार वाढणे. **सांनिपातिक उन्माद लक्षणे**–तीनही दोषांची चिन्हे होतात.

**मनोऽभिघातजोन्मादः हेतवो लक्षणं च**—कामशोकभयक्रोधहर्षेर्ष्यादयो हेतवः ( चचि. ९.८६ ) यदेवास्य मनसि स्थितं तद्बुद्धिपूर्वकं यत्किञ्चिदेवजल्पति चित्रं जल्पति विसंज्ञो गायत्यथहसति रोदिति मूढसंज्ञ इति लक्षणानि ( सुउ. ६२.१३ )

**मनावर आघात झाल्यामुळे होणाऱ्या उन्मादाची कारणे व लक्षणे**–काम, शोक, भय, संताप, आनंद, ईर्ष्या इत्यादी कारणे आहेत. त्याच्या मनांतलेच तो बडबडतो ते विचित्र बडबडतो. अजाणताच गातो, हसतो, रडतो. संज्ञा कळत नाही.

**विषजोन्मादलक्षणम्**—रक्तेक्षणो हतबलेन्द्रियभाः, सुदीनः, श्यावानन उपेक्षितः सन्म्रियते ( सुउ. ६२.१२ )

वेगान्तरेऽपि सम्भ्रान्तो, नष्टच्छायो भवति ( असंसु ९ ( पृष्ठ. ७४ )

**विषाने होणाऱ्या उन्मादाची लक्षणे**–आरक्त डोळे, बळ व इंद्रियांचे तेज नाहीसे होणे, तोंड काळसर. केविलवाणेपणा, ह्या रोगाची उपेक्षा केली तर रोगी मरतो. दुसरे वेग आले तरी भ्रांत चित्ताचा होतो, तेज नाहीसे होते.

**आगन्तुकोन्मादलक्षणं**–यस्तु दोषनिमित्तेभ्य उन्मादेभ्यः समुत्थानपूर्वरूपलिङ्गवेदनोपशयविशेष समन्वितो भवत्युन्मादस्तमागन्तुकमाचक्षते ।

केचित्पुनः पूर्वकृतं कर्माऽप्रशस्तमिच्छन्ति तस्य निमित्तं तस्य च हेतुः प्रज्ञापराध एव इति भगवान् पुनर्वसुरात्रेयः; प्रज्ञापराधाध्ययंदेवर्षिपितृगन्धर्वयक्षराक्षसपिशाचगुरुवृद्धसिद्धाऽऽचार्यपूज्यानवमत्याऽहितान्याचरति। तेन च देवादयस्तमुन्मत्तं कुर्वन्ति ।

**पूर्वरूपम्**—देवगोब्राह्मणतपस्विनां हिंसारुचित्वं, कोपनत्वं, परापकाररुचित्वमरतिरोजोवर्णच्छायाबलवपुषामुपतप्तिः स्वप्ने च देवादिभिरभिभर्त्सनं प्रवर्तनं च ( चनि. ७.१०–११ )

**आगंतुक कारणांनी होणाऱ्या उन्मादाची लक्षणे**–दोषांनी होणाऱ्या उन्मादाच्या कारण (पूर्वरूपे) रूपे व शामके ह्याच्यापेक्षा आगंतूची कारणे इत्यादी निराळी असतात म्हणून त्याला आगंतु म्हणतात. काही वाईट पूर्वकर्म हे कारण मानतात पण त्यालाही बुद्धीचा अपराध हे पुनर्वसु आत्रेय यांच्या मताने कारण आहे. बुद्धीच्या अपराधानेच म्हणजे बुद्धि पूर्वक देव, ऋषि, पितर, गंधर्व, यक्ष, राक्षस, पिशाच्च, गुरु, वृद्ध, सिद्ध, आचार्य या सर्व पूज्यांचा अवमान करून अहिताचरण करतो, त्यामुळे देवादि त्याला उन्मत्त करितात.

**पूर्वरूप**–देव गोब्राह्मण तपस्वी यांची हिंसा करावी असे वाटणे, दुसऱ्यांना अपकार करण्यात आनंद, संताप, बेचैनी, ओज, वर्ण, च्छाया, बल, शरीर यांत विकृति, स्वप्नात देवादिकांकडून तिरस्कार, व पछाडले जाणे.

**रूपाणि**–अत्यात्मबलवीर्यपौरुषपराक्रमग्रहणधारणस्मरणज्ञानवचनविज्ञानानि। अनियतश्चोन्मादकालः।

**आवेशप्रकारः**—देवादयोऽवलोकयन्तो, गुर्वादयोऽभिशपन्तः पितर आत्मानं दर्शयन्तो, गन्धर्वाः स्पृशन्तो यक्षाः समाविशन्तो, राक्षसा आत्मगन्धमाघ्रापयन्तः, पिशाचा आरुह्य वाहयन्तस्तमुन्मत्तयन्ति ।

**रूपे**–स्वतःचे बळ, वीर्य, पौरुष, पराक्रम, ग्रहणशक्ति, धारणाशक्ति, स्मरणशक्ति, ज्ञान, बोलणे व विज्ञान हीं प्रमाणाने अतिशय वाढतात. उन्माद येण्याचा काळ निश्चित नाही.

**पछाडण्याचा प्रकारः**–देवादि पाहून, गुरु इत्यादी शाप देऊन, पितर आपले दर्शन देऊन गंधर्व शरिराला स्पर्श करून, यक्ष शरिरात शिरून, राक्षस स्वतःचा वास देऊन, पिशाच्च आक्रमण करून त्याला नेतात व उन्माद करतात.

**अभिघातकालः**—पापस्य कर्मणः समारम्भे, पूर्वकृतस्य कर्मणः परिणामकाले, एकस्य शून्यगृहवासे, चतुष्पथाधिष्ठाने वा सन्ध्यावेलायामप्रयतभावे वाऽमापूर्णादिपर्वसन्धिषु वा मिथुनीभावे रजस्वलाभिगमने, विगुणे वाऽध्ययनबलिमङ्गलहोमप्रयोगे, नियमव्रतब्रह्मचर्यभङ्गे वा महाहवे वा देशकुलपुरविनाशे, महाग्रहोपगमने वा, स्त्रियाः वा प्रजननकाले, विविधभूताऽशुभाशुचिस्पर्शने वा, वमनविरेचनरुधिरस्रावेऽशुचेरप्रयतस्य वा चैत्यदेवायतनादिगमने वा मांसमधुतिलगुडमद्योच्छिष्टे वा दिग्वाससि वा निशिनगरनिगमचतुष्पथोपवनश्मशानाऽऽघातनाभिगमने वा द्विजगुरुसुरयतिपूज्याभिधर्षणे वा धर्माख्यानव्यतिक्रमे वाऽप्रशस्त–कर्मारम्भेवा,

**पछाडण्याची वेळ**–पापकर्म करीत असता, पूर्वपापकर्माचा परिपाक होतांना, रिकाम्या घरात एकटे

असतांना, चवाठ्यावर, संध्याकालात, अपवित्र कर्म करताना, अमावास्या, पूर्णिमा इत्यादी पर्वकाली तसेच रजःस्वलेशी ३ दिवसात संभोग करणे, अध्ययन, बली, मंगल, होम, चुकीच्या विधीने करणे, नियम व्रते ब्रह्मचर्य यांचा भंग केला असता, मोठे युद्ध किंवा देश, कुळ, गांव नष्ट झाले असता, मोठा क्रूर ग्रह, आपल्या राशीत अनिष्ट असताना, बाळंतपणात निरनिराळ्या भूतांचा अशुभ व अशुचि द्रव्यांचा स्पर्श झाला असतां, वांती रेच रक्तस्राव होत असताना अशुचि असतां, पिंपळाचा पार, देवालय, यांत गेले असतां, मांस, मध, तीळ, गूळ, मद्य यांचे उच्छिष्ट भक्षण केले असताना, नग्न असताना, रात्रीं शहराच्या किंवा गावाच्या बाजार अथवा चवाठ्यात, उपवन, स्मशान, वधस्थानात गेले असता ब्राह्मण, गुरु, देव, संन्यासी, पूज्य व्यक्ति यांच्याशी भांडले तर तसेच धर्माची आज्ञा उल्लंघन केली तर किंवा अप्रशस्त कर्मे करताना पछाडतात.

**प्रयोजनम्–उन्मादकरभूतानामुन्मादकरत्वे हिंसार-तिरभ्यर्चनम्–हिंसादिनोन्माद्यमानोऽग्निं प्रविश-त्यप्सु निमज्जति स्थलात् श्वभ्रे वा पतति शस्त्रकशा-दिभिरात्मानं हन्त्यन्यच्च प्राणवधार्थमारभते किञ्चित् ।** ( चनि. ७.१०–१७. )

**भूतादींच्या आवेशाचा हेतु**–क्रीडा करणे, पूजा करवून घेणे, व ठार मारणे. हिंसेच्या हेतूने उन्माद कारक भूतांनी पछाडले तर रोगी अग्नीत शिरतो, पाण्यात बुडतो, उंच जागेवरून खड्ड्यात पडतो, शस्त्र चावूक इत्यादींनी आपणांस मारून घेतो तसेच इतर साधनानी ही आपला जीव देण्याचा प्रयत्न करतो.

**उन्मादो बालेषु–प्रलापोऽरतिर्वैचित्त्यं चेति बालो-न्मादस्य मुख्यानि लक्षणानि** ( कासू. २५.२० )

**बाळकाला उन्माद असता**–वडबड, बेचैनी, चित्त ठिकाणावर नसणे हीं लक्षणे मुख्य असतात.

**चिकित्सा–स्नेहस्वेदवमनविरेचनाऽऽस्थापनाऽनुवास-नोपशमननस्यधूमधूपनाऽञ्जनावपीडनप्रधमनाऽभ्यङ्ग-प्रदेहपरिषेकाऽनुलेपनवधबन्धनाऽवरोधनवित्रासन विस्मापनविस्मारणाऽपतर्पण सिराव्यधनानि, यथास्वं भोजनविधानं निदानविपरीतमौषधादि च** ( चनि. ७. ८; ) **यद्यपि उन्मादचिकित्सिते सुश्रु-तेन वातादिजोन्मादचिकित्सा नोक्ता तथाप्यपस्मार-क्रियावदुन्मादे वातादिदोषचिकित्साकार्या यथादो-षमिति प्रतिपादितम्** ( सु. उ. ६२.३३ )

**स्निग्धस्विन्नमुन्मादार्तं तीक्ष्णैः रेकैः शिरोविरेकैश्च विशोधयेत्सर्षपस्नेहसंयुतैरवपीडैर्नस्यैश्चोपक्रमेत् तथा श्वगोमांसैः सततं धूपयेत्सर्षपतैलेन च सदा नस्या-भ्यङ्गौ कार्यौ । सर्पदर्शनं कशाताडनं यन्त्रणामग्निना च त्रासनं जरत्कूपवास इत्याद्युपक्रमाः कार्याः** ( सुउ. ६२.१४–१९ )

**रत्यभ्यर्चननिमित्त आगन्तुकोन्मादः मन्त्रौषधिमणि-मङ्गलबल्युपहारहोमनियमव्रतप्रायश्चित्तोपवास-स्वस्त्ययनप्रणिपातगमनादीनि** ( च. नि७.१६ )

**उपचार**–स्नेहन, शेकणे, घाम काढणे, वांतीचे व रेचक औषध देणे, शोधक व स्नेहनबस्ती शामक औषधे नाकात घालणे, धूम्रपान, धुरी देणे, अंजन, अवपीडक व प्रधमन नस्य, अंगाला अभ्यंग करणे, लेप लावणे, उटणी लावणे, औषधे शिंपडणे, वध करण्याचा, बांधण्याचा धाक घालणे, बांधून ठेवणे, त्रास देणे, आश्चर्य निर्माण करणे, विस्मरण होईल असे करणे, लंघन, रक्तस्राव, घडलेल्या कारणांच्या विपरीत औषधे इ० देणे व वातादिदोषानुरूप आहार आणि उपचार करावे. सुश्रुताने उन्माद चिकित्सेत जरी वातादि दोषांच्या उन्मादाची चिकित्सा सांगितली नसली तरी अपस्माराप्रमाणें येथें वातादींची चिकित्सा करावी असे सुचविले आहे.

उन्माद रोग्याला स्नेहन स्वेदन केल्यावर तीक्ष्ण विरेचने व शिरो विरेचने देऊन शुद्ध करावे आणि अवपीडन नस्याकरितां व अभ्यंगाकरिता मोहरीचे तेल वापरावे. कुत्रा, गाय यांच्या मांसाची सतत धुरी द्यावी. नेहमी अभ्यंग आणि नस्य देत जावे. साप दाखवावा, चाबकाने मारावे. बांधावे. अग्नीचे चटके द्यावे, जुनाट निर्जल आड विहीर यांत ठेवावे इ० उपचार करावे. भूतादींचा पछाडण्याचा हेतु केवळ क्रीडा अथवा पूजा करून घेणे हा असेल तर मंत्र, औषधि, मणि, बांधणे, मंगल कर्मे करावीत, बळी द्यावेत, आहुती द्याव्यात, होम करावे, व्रत, नियम, प्रायश्चित्त, उपवास, ग्रहमख, नमस्कार, तीर्थयात्रा इत्यादी उपचार करावेत.

**सामान्या मानसचिकित्सा–तद्विद्यसेवाऽऽत्मादि-विज्ञानं त्रिवर्गस्यान्वेक्षणं चेति भैषज्यम्** ( चसू. ११.४६–४७ )

**सामान्यमानसचिकित्सा**– विद्वानांची सेवा आत्मज्ञान धर्मार्थकाम यांचा विचार करणे

साध्यासाध्यत्वम्–अधोमुखः ऊर्ध्वमुखः क्षीणमांसबलो नरोऽनिद्रः सन्नसंदेहेन विनश्यत्यसाध्यो वा भवति ( सुसू. ३३.२५ )
खाली किंवा वर तोंड ठेवणारा, मांस बल क्षीण झालेला, झोप न येणारा, निःसंशय मरतो किंवा असाध्य होतो.

अरिष्टलक्षणानि–ध्यानायासोद्वेगयुक्तोऽस्थानसम्भवेन मोहेन ग्रस्तोऽरतिमान् सञ्जातबलहानिराहारद्वेषी, लुप्तचित्तउदर्दितः, क्रोधनस्त्रासबहुलः, सत्कृत्प्रहसिताननो, मूर्च्छापिपासाबहुलोऽरिष्टसूचके स्वप्ने रक्षोगणैः साकं नृत्यञ्जलनिमज्जनं पश्यति । ( चइ. ५.१८–२१ )

मरणदर्शक चिन्हे–अस्थानी चिंतन, श्रम करणे, उद्विग्न होणे, मूर्च्छा येणे, बेचैन होणे, बलनाश, अन्नद्वेष, शून्य मन होणे, अंगावर गांधी येणे, संताप होणे, त्रास फार होणे. मध्येच तोंडावर हास्य दिसणे, अतिशय तहान, अशुभसूचक स्वप्नात भूतपिशाचाबरोबर नाचतो आहोत, पाण्यात डुंबत आहो असे दिसणे ही सर्व अशुभ लक्षणे आहेत.
एकदम मोठ्याने हसणारा, मूर्च्छा व तहान पुष्कळ असणारा, स्वप्नात राक्षसांबरोबर स्वतः नाचतो पाण्यात बुडतो असे पहाणारा, उन्मादाने निश्चित मरतो.

अक्लिष्टमानवं देवादयः स्वयं नोपक्लिश्नन्ति । यत् तु एतेऽनुवर्तन्ते क्लिश्यमानं तत्पूपक्लिश्यमानस्य कुकर्मतयैव ( चनि. ७.१९–२० )
त्रस्त नसलेल्या मनुष्याला देवादी स्वतः त्रास देत नाहीत पण स्वतःच्या पापकर्माने जे दोषी होतात त्यांना देवादी त्रास देतात.

विगतोन्मादलक्षणम्–इन्द्रियार्थानां बुद्ध्यात्ममनसां च प्रसादो, धातूनां प्रकृतिस्थत्वं च ( असंउ. ९. पृ. ७९ ) संदर्भग्रंथ–( अहउ. ६ )
इंद्रियें बुद्धि मन व आत्मा प्रसन्न होणे व धातु प्राकृत–नेहमीसारखे निर्दोष होणे.

–चिकित्सित–पु., अध्याय० ( चचि. २.१ )
उन्माद चिकित्सेच्या अध्यायाचे नांव.

–निदान–न., अध्याय० ( चनि. ७.१ )
उन्मादरोगाच्या निदानाच्या अध्यायाचे नांव.

–प्रतिषेध–पु., अध्याय० ( सुउ. ६२.१ )
ज्यात उन्माद निदान चिकित्सा दिली आहे अशा अध्यायाचें नांव.

उन्मान–न., मान० द्रोणः, चतुराढकं चतुर्विंशत्यधिकसहस्रतोलकं वा मानम् ( र. ११.८–९ )
द्रोणनामक एक मान–वजन. एक द्रोण=४ आढक. अथवा १०२४ तोळे ( एक हजार चोवीस ) म्हणजे सुमारे तेरा शेर.

उन्मार्ग–पु., स्वस्थानातिरिक्तमन्यत्स्थानम् ( सुउ. ६२.३ )
चुकीचा मार्ग. स्वस्थानाखेरीज अन्य स्थान किंवा मार्ग.

उन्मार्गिन्–वि., भगन्दररोगप्रकार० ( सुनि. ४.९ )
भगंदर रोगाचा एक प्रकार.

उन्मित–वि., तुलया मितः ( चचि. १.४१ )
तराजूने तोललेला, मोजमाप केलेला.

उन्मेष–पु., चक्षुषोरुन्मीलनम् कर्मपुरुषस्य गुणेष्वेकः ( सुशा. १.१७ )
देहे वातकर्म० ( चशा. ७.१६. )
डोळे उघडणे, कर्मपुरुषाचा एक गुण. वाताचे शरिरातील एक कर्म.

उपकरण–न., साधनं कर्तुः सम्पाद्ये कार्ये सहकारितया व्याप्रियते ( चवि. ८.७० )
संदंशादिसाधनम् ( चवि. ७.१५ )
साधन. करावयाच्या कार्याकरिता ज्यांच्या सहाय्याने ते करावयाचे त्यापैकी प्रत्येक सामुग्री. चिमटा वगैरे हत्यार. भेषजम् ( चनि. २.२२ )
औषधि, औषध.

–वत्–वि., रोगप्रतिकारे आवश्यकचिकित्सासाधनैः सुसंपन्नः ( सुचि. ५.१९ )
रोगाचा प्रतिकार करण्याकरिता आवश्यक त्या चिकित्सेच्या साधनांनी युक्त चिकित्सासाधने जवळ असलेला.

उपकल्पना–स्त्री., समीपढौकना, आहारद्रव्यस्य तत्तद्धात्वादिमयेषु आधारभूतेषु पात्रेषु उपकल्पनम् । ( सुसू. ४६.४४९ )
१–कार्ष्णायसे घृतं देयम् २–राजते पेया देया ३–फलानि सर्वान् भक्ष्यांश्च दलेषु प्रदद्यात् ४–परिशुष्कप्रदिग्धानि सौवर्णेषु प्रदद्यात् ५–प्रद्रवाणि रसाँश्च राजतेषूपहारयेत् ६–कट्वराणि सर्वान् खडाँश्च शैलेषु दापयेत् ७–ताम्रमये पात्रे सुशीतं सुशृतं पयः पानीयं दापयेत् ८–रागषाडवसट्टकान् शीतलेषु शुभेषु काचस्फटिकपात्रेषु वैदूर्यचित्रेषु दद्यात् ( सुसू. ४६.४४८–४५२ )

जवळ ठेवणे. योग्य त्या धातूच्या भांड्यातून खाद्य-पेय पदार्थ ठेवणे-देणे. खाद्यपेय पदार्थाला विकृत न करिता, त्यात अधिक गुण निर्माण करणारे किंवा त्यांचे गुण तसेच रक्षण करणारे भांडे वापरणे. उ. पोलादाच्या भांड्यात तूप; चांदीच्या भांड्यात पेया; चावून खाण्याचे पदार्थ किंवा फळे झाडाच्या पानात; (पत्रावळीत) मसाला लावून तुपात तळलेले पदार्थ किंवा कालवण सोन्याच्या भांड्यात; अति-पातळ पदार्थ व मांस रस चांदीच्या भांड्यात; ताक, दह्याची साय, इतर आंबट पदार्थ, मसाला, दगड्यांमध्ये; तापवून थंड केलेले पिण्याचे पाणी तांब्याच्या भांड्यात; चटण्या, कोशिंबिरी, लोणचे, मुरंबा, तिखट आंबट गोड मीठ घातलेल्या अनेक कोशिंबिरी, अवलेह, काच, स्फटिक, वैडूर्य यांच्या भांड्यात द्यावेत, ठेवावेत.

**उपदेशः** ( चक. १.३ ) उपदेश, निर्देश, योग्य ते सांगणे.

**उपकल्पनीय**–वि., अध्याय० **चरकसूत्रे शोधनोपकल्पनामधिकृत्य कृतोऽध्यायः** ( चसू. १५,१ )
**काश्यपसंहितासूत्रस्थाने अध्यायः**
( कासू. २४ पृ. २९ )
चरक व काश्यपसंहितेतील एका अध्यायाचे नाव. ह्यात शोधन चिकित्सेची साधनसामुग्री व इतर सर्व माहिती आहे.

**उपकालिका**–स्त्री , वनस्पति० **पृथ्वीका** ( ध. २.५९ )
काळे जिरे, मोठे जिरे, लहान वेलची.

**उपकुञ्चा**–स्त्री., वनस्पति० **पृथ्वीका, कृष्णजीरकम्, बृहज्जीरकम्** ( ध. २.५९ ) काळे जिरे, मोठे जिरे. **सूक्ष्मैला** ( चक. १३.२३ ) लहान वेलदोडा.

**उपकुञ्चिका**–स्त्री., उपकुञ्चा ( चचि. १३.१२५ )
पहा 'उपकुञ्चा'

**उपकुञ्ची**–स्त्री., 'उपकुञ्चा' ( ध. २.५९ )
पहा 'उपकुञ्चा'

**उपकुण्डन**–परिव० न., **विपाचनम्** ( चवि७.२१ )
सांगितलेल्या पद्धतीप्रमाणे शिजविणे.

**उपकुल्या**–स्त्री., वनस्पति० **पिप्पली** ( चचि. ७.१४५ ) ( सुचि. ९.८ ) पिंपळी.

**उपकुश**–पु.,दन्तरोग० **रक्तपित्तसमुत्पन्नोऽयं व्याधिः लक्षणम्–दन्तवेष्टेषु दाहः पाकश्च तेन दन्ताश्चलन्ति । आघट्टिताः सन्तो मन्दवेदना युतं रक्तं स्रवन्ति : रक्ते स्रुते च आध्मायन्ते । मुखं पूति जायते**
(सुनि. १६.२१.२२.)
हिरड्यांचा एक रोग. रक्तपित्तजन्य रोग, या रोगात हिरड्यांचा क्षोभ व पाक होतो. दांत हलतात; ते एकावर एक दाबले तर रक्त स्राव व मंद वेदना होते व तेथे नंतर रक्तस्रावाने फुगवटी येते. तोंडाला घाण येते.

**चिकित्सा–वमनविरेचनाभ्यामूर्ध्वमधश्च कायं शोधयित्वा शिरोविरेचनेन शिरः शोधयेत् । अनन्तरं काकोदुम्बरिकागोजीपत्रैः रक्तमोक्षः करणीयः । मधुना सह सव्योषलवणैः प्रतिसारणं करणीयम् । नागरनैचुलफलसर्षपपिप्पलीयुक्तस्य जलस्य कवलं धारयेत् । काकोल्यादिभिः सिद्धं घृतं कवलार्थं नस्यार्थं चोपयोक्तव्यम् ।** ( सुचि. २२.१९-२१ )
वमन विरेचनाने ऊर्ध्व व अधः शरीरशुद्धि व शिरोविरेचनाने शिरः शुद्धि करवावी. काळा उंबर व पाथरी यांच्या योगे रक्तस्राव करवून मधातून सुंठ, मिरे, पिंपळी, सैंधव चोळावे. सुंठ, वेत, गेळफळ, मोहरी, पिंपळी घालून उकळून थंड केलेल्या पाण्याचे गुळणे तोंडात धरावे. काकोलीगणातील औषधांनी सिद्ध केलेले तूप तोंडात ठेवावे व नाकात सोडावे.

**उपक्रम**–पु., **चिकित्सा-कर्म** ( अहसू. १४.१ )
**उपक्रमाश्च समासतो द्विविधाः–लंघनं बृंहणं चेति । लंघनं द्विविधं । शोधनं शमनं च । शोधनं दोषान् बहिरीरयेत् तच्च पंचधा–निरूहो वमनं कायरेकः शिरोरेकोऽस्रविस्रुतिश्च । शमनं-यद्दोषान्न शोधयति, समान्नोदीरयति विषमांश्च समीकरोति । तच्च सप्तधा–पाचनं, दीपनं, क्षुत्, तृड्, व्यायाम, आतपो, मारुतः इति ।**
( अहसू. १४.७., चसू २२.१८)
**सर्व रोगाणां षडुपक्रमा भवन्ति लंघनं, बृंहणं, रूक्षणं, स्नेहनं, स्वेदनं स्तम्भनं च** ( चसू. २२.४ )
**( १ ) देहे यत् किंचित् लाघवकरं तल्लंघनम् ( २ ) यत् शरीरस्य बृहत्त्वं जनयेत्तत् बृंहणं मतम् ( ३ ) रौक्ष्यं खरत्वं वैशद्यं यज्जनयति तद्रूक्षणम् ( ४ ) स्नेहविष्यन्दमार्दवक्लेदकारकं स्नेहनम् ( ५ ) स्तम्भगौरवशीतघ्नं स्वेदकारकं च स्वेदनम् ( ६ ) यद् गतिमन्तं चलं ध्रुवं स्तम्भयति तत् स्तम्भनम् ।**
( चसू. २२.९.१२ )
**व्रणस्य षष्टिरुपक्रमा भवन्ति** ( सुचि. १. ८ )
**बृंहणं शमनं त्वेववायोः पित्तानिलस्य च**
( असंसू. २४.९., अहसू. १४.७ )

चिकित्साकर्म. साधारणतः उपचार प्रकार २. लंघन व बृंहण. लंघनप्रकार २. शोधन व शमन. शोधन म्हणजे दोष बाहेर काढणारे उपचार; त्याचे प्रकार ५. वांती, रेच, रक्तस्राव, डोक्याचा रेच, व मल-काढणारा औषधि बस्ति ( एनिमासारखा ). शमन म्हणजे दोषांचा त्रास कमी करणारे. विषम दोष सम करणारे उपचार. त्याचे प्रकार ७. पाचक, अग्नि-दीपक, भूक चांगली लागेपर्यंत लंघन, तहान चांगली लागेपर्यंत पाणी न पिणे, व्यायाम. ऊन्ह, वारा यांचे सेवन.

सर्व रोगांचे उपचार म्हणजे सहा प्रकारची चिकित्सा लंघन, बृंहण, रूक्षण, स्नेहन, स्वेदन व स्तंभन.

( १ ) **लंघन**–शरीर हलके करणारे
( २ ) **बृंहण**–शरीर पुष्ट करणारे
( ३ ) **रूक्षण**–रूक्षता, खरखरीतपणा व स्वच्छता निर्माण करणारे.
( ४ ) **स्नेहन**–स्निग्धता, स्राव, मृदुता व आर्द्रता निर्माण करणारे.
( ५ ) **स्वेदन**–आखडणे, जडपणा, थंडपणा नाहीसा करून घाम आणणारे.
( ६ ) **चलगुण थांबविते ते.**

**आणखी एक शमन**–
व्रणाच्या ६० चिकित्सा आहेत. वात व वातपित्त दुष्टीच्या वेळी बृंहण हेच शमन आहे.

**उपक्रम्य**–वि., **चिकित्सनीयः ।** ( असंसू. २४ )
चिकित्सा केली पाहिजे असा; चिकित्सा करण्यास योग्य.

**उपक्रान्त**–वि., **चिकित्सितः ।** ( सुनि. १५.१५ )
चिकित्सा केलेला, उपचार केलेला.

**उपक्लिष्टसत्व**–वि., **रजस्तमोभ्यामुपहतचेताः** ( चनि. ७.४ ) रज व तम या मानसिक दोषांनी ज्याचे मन दुष्ट आहे असा, पीडित असलेला.

**उपक्लेदन**–न., **द्रवीकरणम्** ( चवि. १.१८ )
क्लिन्न करणे, आर्द्र करणे, द्रव करणे.

**उपक्षित**–वि., **भोक्तुं दत्तमन्नम्** ( सुक. १.३४ )
जेवणाकरिता वाढलेले अन्न.

**उपक्षीणौजस्**–वि., **उपक्षीणम् ओजो यस्य सः** ( चसू. १४.१९ ) ओजःक्षीण, बलक्षीण, अबल, ज्याचे ओज क्षीण आहे असा.

**उपगमन**–न., **समीपे गमनम्, उत्पत्तिः** ( अहसू. ८.५५ ) जवळ जाणे, उत्पन्न होणे.

**उपघात**–पु., **विनाशः** ( चसू. २८.२० )
**बाधा** ( सुचि. २७.१ ) बाधणे; बाधा, नाश.
**मर्मसमीपदेशस्य घातः** ( सुशा. ६.४१ )
मर्माच्या जवळच्या भागावर झालेला आघात.

**उपचक्र**–पु., **ककरभेदः कृशचञ्चुर्मदाविलः** ( सुसू. ४६.५० )
**चकोरभेदः** ( चसू. २७.४७ )
**गुणाः–तस्य मांसरसो ज्वरे हितः । ककरवदस्य गुणा भवन्ति**
चक्रवाक पक्ष्याचा प्रकार. याचा मांसरस ज्वरात हितकर. चकोरपक्षी.

**उपचक्रक**–पु., **उपचक्रः** ( सुसू. ४६.६४ )
पहा ' उपचक्र '

**उपचय**–पु., **पुष्टिः** ( चसू. १.८७ सुचि. ३५.४ )
वृद्धि; पुष्टि.
**–वर्धन**–वि., **पुष्टिकरम्** ( चसू. १.८७ )
पोषक, पुष्टिकारक, शरीर घटकांची वाढ होणे.

**उपचार**–पु., **चिकित्सा** ( अहसू. ५.६६ )
चिकित्सा, इलाज, उपाय.

**उपचित्रपर्णी**–स्त्री., **वनस्पति०** ( असंचि. १० पृ. ६५ )
एक वनस्पति.

**उपचित्रा**–स्त्री., **वनस्पति० पृश्निपर्णी** ( रा. ४.११८ )
**दन्ती** ( ध. १.२२३ ) पिठवण, दांती.

**उपजिह्व**–पु., ( असंउ. २५ ) **( उपजिह्वा )** स्त्री० ( चसू. २४.९ )
**शारीरावयव० जिह्वाया अधोगता जिह्वा तथोपरिगता च ग्राह्या । षट्पञ्चाशत् प्रत्यङ्गेष्वेकम् । द्वे उपजिह्विके** ( चशा ७.११ ) **अधिजिह्वासदृश उपजिह्वः । रोग० जिह्वाया उपरिस्थितः शोफः** ( असंउ. २५. (पृ. १७९ )
एक शरीरावयव. जिभेच्या खाली असलेले दोन्ही बाजूस असलेला एकेक अवयव. पडजीभ. एक रोग; जिभेवर येणारी सूज.

**उपजिह्वक**–पु., **उपजिह्वः** ( र. २४.४६ )
पहा ' उपजिह्व '

**उपजिव्हिका**–स्त्री., **उपजिह्वा** ( चशा. ७.११ )
पहा ' उपजिह्व '
**रोग० जिह्वागतो मुखरोग०** ( सुनि. १६.३६ )
**मांसप्रदोषजरोगेष्वेकः** ( चसू. २८.१४ )
( सुसू. २४.९ ) **उपजिह्वकाश्रितः शोफः** ( चचि. १२.७७ ) ( असंउ. २५. पृ. १७९ )

जिह्वाग्ररूपः श्वयथुर्जिह्वामुन्नम्य जातः कफरक्तयोनिः, प्रसेककण्डूःपरिदाहयुक्ता प्रकथ्यतेऽसावुपजिह्वि । जिह्वाया अधो भवति (सुनि. १६.३९)
जिभेचा एक रोग. मांस दुष्टिजन्य रोगातील एक रोग. उपजिव्हिकेची सूज. **चिन्हे**–जिभेच्या खालच्या उपजिव्हिकेची सूज. कफरक्त दुष्टि. तोंडाला पाणी, खाज व आग.

**चिकित्सा—उपजिह्वाया लेखनं कृत्वा क्षारेण जिह्वां प्रतिसारयेत् । शिरोविरेकगण्डूषधूमा उपयोक्तव्याः [ गण्डूषः कफव्रणहरद्रव्येण ] कफकण्टकहरद्रव्येण वा, धूमो वैरेचनिकः**
(सुचि. २२.४८)
जीभ खरडून क्षार चोळणे. डोके शुद्ध करणारे नस्य. धूम्रपान (विरेचक) व गुळण्या (कफव्रणहर)

**उपजीव्य**–वि., **आश्रयदाता** (असंसू. ३) आश्रदाता.

**उपजोषम्**–(अव्यय.) **यथेच्छम्**
(**काकभोजन कल्प० ॥ १३ ॥**)
इच्छेप्रमाणे, यथेच्छ.

**उपतप्त**–वि., **दुष्ट** ((चशा. ३.१७) दोषयुक्त.
**पीडितम् अनुपतप्तम्–अपीडितम्** (**परिव०**)
(चसू. ८.१७; अहसू. ८.३३)
पिडलेला. थोडा पिडलेला.

**उपतप्ति**–स्त्री., **विनाशः** (चनि. ७.११)
क्षीणता, ऱ्हास, नाश.

**उपताप**–पु., **किञ्चिद्वैकल्यम्** (चसू. २८.२०)
किंचित विकलता.

**उपदंश**–पु., **गुह्यरोग० छेद्यरोग०** (सुनि. १२.१)
(सुसू. २५.४)

**निदानम्–हस्ताभिघातान्नखदन्तपाताद्धावनाद्योनिप्रदोषाद्विविधापचारैः शिश्ने उपदंशा भवन्ति** (मा;) **कर्कशरोमां नारीमुपसेवमानस्य दोषाः श्वयथुमुपजनयन्ति स एवोपदंशः** (सुनि. १२.७)
**सम्प्राप्तिः—अतिमैथुनादिभिः प्रकुपिता दोषा मेढ्रमागम्य क्षतेऽक्षते वा श्वयथुमुपजनयन्ति**
(सुनि. १२.७–९)

**संख्यासम्प्राप्ति–वातिकः पैत्तिकः श्लैष्मिकः सांनिपातिको रक्तजश्च** (सुनि. १२.१८)
**लक्षणानि–१) वातजः–मेढ्रे शोफाश्चित्रारुजः, स्तम्भस्त्वक्परिपोटनं च २) पित्तजः–मेढ्रे पक्वोदुम्बरसंकाशः श्वयथुर्ज्वरश्च ३) कफजः–कठिनः, स्निग्धः, कण्डूमान्, शीतलो गुरुश्च शोफः मेढ्रे, ४) सांनिपातिकः–सर्वलिङ्गत्वं तथा च मुष्कयोरपि श्वयथुस्तीव्रा रुगाशुपचनं, दारणं कृमिसम्भवश्च ५) रक्तजः–असितस्फोटसम्भवोऽस्रस्रुतिर्ज्वरश्च**
(असंउ. ३८ पृ. २८४–८५)

**साध्यासाध्यत्वम्–रक्तजो याप्यः संनिपातजोऽसाध्यः पृथग्दोषजाः साध्याः** (असंउ. ३८ पृ. २८५)
जननेंद्रियाचा रोग. **कारणे**–हात, दात, नख यांचा आघात, इंद्रिय न धुणे, दूषित योनि संभोग, राठ केसांची–रुक्ष–शुष्क योनि असलेल्या स्त्रीशी संभोग. संप्राप्ती–अतिमैथुनादि कारणांनी प्रकुपित दोष जननेंद्रियाच्या ठिकाणी व्रण असो वा नसो सूज उत्पन्न करतात. प्रकार ५–वात, पित्त, कफ, सन्निपातज व रक्तज.

**वातज**–जननेंद्रियाच्या त्वचेला भेगा, ताठरपणा व वेदना.

**पित्तज**–ज्वर, पिकलेल्या उंबरासारखे लाल व सूजयुक्त इंद्रिय.

**कफज**–स्निग्ध, कठिण, थंड, जड, अशी सूज व खाज

**संनिपातज**–वरील सर्व चिन्हे. शिवाय वृषणावर सूज, तीव्र वेदना; सूज लौकर पिकते, फुटते व व्रणात कृमि.

**रक्तज**–काळे फोड, रक्तस्राव आणि ताप.

**साध्यासाध्यत्व**–पहिले ३ साध्य. रक्तज विकार चिकित्सा आहे तोपर्यंत बरा. नाही तर त्रास चालू; त्रिदोषज असाध्य.

**रिष्टलक्षणम्-शोथकृमिदाहपाकैर्विशीर्णशिश्नो म्रियते । सामान्यचिकित्सा–आमावस्थायां संशोधनालेपनसेकशोणितमोक्षणैर्यथापाकं न याति तथा प्रतिकुर्यात् । पाकावस्थायां शस्त्रेणोपचरेत् । प्रक्षालनार्थं करवीरस्य जात्या आरग्वधस्य वैजयन्त्याः पत्राणि प्रयुञ्जीरन् । सौराष्ट्र्यादि चूर्णं क्षौद्रादिसंयुक्तमुपदंशेषु पूजितम् । गोजिह्वादिसिद्धं तैलं रोपणार्थं युक्तम् । स्वर्जिकादिचूर्णं व्रणे विसर्पनाशकम्** । (सुचि. १९.३६–४८)
**स्निग्धस्विन्नस्य देहिनो मेढ्रमध्ये सिरां विध्येदथवा जलौकसः पातयेत् । अत्यर्थमुच्छ्रितानुभयतो वमनविरेचनाभ्याम् हरेत । दुर्बलस्याप्राप्तविरेचनस्य वाऽत्यर्थमुच्छ्रितान् दोषान् निरूहेण हरेत्**
(सुचि. १९.२५–२७)

**विगतोपदंशलक्षणम्–रुक्शोफशान्तिः**
(सुचि. १९.२६)

**मरणदर्शक लक्षणे**–सूज, कृमि, आग, पिकणे यांनी शिश्न विच्छिन्न झाले तर रोगी मरतो. **सामान्य उपचार आमावस्था**–वामक, रेचक यांनी शरीर शुद्ध करणे, लेप, औषध शिंपडणे, रक्तस्राव करून पिकू देऊ नये.

**पक्वावस्था**–पिकल्यावर शस्त्रक्रिया. व्रण धुण्याकरिता कण्हेर, जाई, बाहवा, हळद यांची पाने उपयोगात आणावीत. तुरटी इत्यादीं चूर्ण मध इत्यादीं मध्ये कालवून लावावे, पाथरी इत्यादींनीसिद्धतेल रोपणा करिता. सज्जीखार इत्यादी चूर्ण व्रणावर लावावे. हे धावरे नाशक आहे. **रक्तस्राव**–शरीर स्निग्ध करून शेकून शिश्नाची शीर तोडावी. किंवा जळवा लावाव्या, दुर्बल रोग्याला विरेचन देता येत नाही; तरी दोष फार असतील तर शोधक बस्ति द्यावा. **गरमी गेल्याची चिन्हे** वेदना व सूज जाणे. **भोजनेऽन्नात्पूर्वमव्यवहितं यन्मूलकादि खाद्यते तदेव मूलकादि उपदंश इति व्यपदिश्यते ।** ( चनि. २.४ ) मुळा, आले इत्यादी खाऊन लगेच जेवण घेतले तर त्यावेळी मुळा इत्यादींना उपदंश म्हणतात.

**व्यञ्जनम्** सुउ. ४१.३८ ) चटणी, तोंडी लावणे. मद्य किंवा आसव इत्यादी पेयात ती रुचकर होण्याकरिता त्यांत घालावयाचे पदार्थ.

**वनस्पति०–समष्ठिलः** ( रा. परि. ४.१ ) कडु सुरण; नद्याम्र नामक वनस्पति.

**–क्षम** पु., **वनस्पति० शिग्रुः** ( रा. ७.६० ) शोभांजन, शेवगा, शिग्रु, शेकट.

**उपदग्ध**–वि., **अतिपाकत्वेन ज्वलितम्** ( सुसू. ४६.४७८ ) शिजताना किंवा भाजताना जळालेले.

**उपदेश**–पु., **कथनम्** ( सुसू. ४०.४ ) सांगणे. दाखविणे श्रोत्याने वा वाचकाने जे आचरणात आणले पाहिजे असे वचन, वाक्य, किंवा विधान.

**आप्तवचनम्** ( चवि. ४.७ ) वास्तववादी मान्य तज्ञांचे सांगणे, विधान.

**आगमप्रमाणम्** ( चवि. ८.८३ ) वैदिक शास्त्राचें प्रमाण. पुराव्याचे वैदिक विधान.

**तन्त्रयुक्ति० एवं कुर्यादित्युपदेशः यथा 'तथा न जागृयाद्रात्रौ दिवास्वप्नं च वर्जयेत्' ।** ( सुउ. ६५.१४ ) एक तंत्रयुक्ति. आज्ञार्थक वाक्य. असे कर असे विधान. जसे रात्री जागू नकोस व दिवसा झोपू नकोस.

**उपदेह**–पु., **मलः** ( चसि. २.२१ )

**मलरूपः उपलेपः** ( सुचि. ३६.१७ )

**मलवृद्धिः** ( चशा. ६.१७ )

**उपलेपः ( परिव. )** ( सुचि. १६.१४ )

मळ, मळाची वाढ, लेप, कान, नाक, इत्यादी शरीरछिद्रांतील मळ.

**उपद्रव**–पु., **रोगः** ( सुचि. ३३.१ ) रोग.

**उपद्रवति, उत्पद्यमानस्यव्याधेः समीपे उपैतीत्युपद्रवः, उपद्रवस्य व्याधेः पश्चाज्जायमानत्वात् । उपद्रवस्तु खलु रोगोत्तरकालजो रोगाश्रयो रोग एव । तत्र प्रधानो व्याधिः । व्याधेर्यो गुणभूत उपद्रवस्तस्य प्रायः प्रधानप्रशमे प्रशमो भवति । स तु पीडाकरतरोभवति पश्चादुत्पद्यमानो व्याधिपरिक्लिष्टशरीरत्वाद् । तस्मादुपद्रवं त्वरमाणोऽभिबाधेत ।** ( चचि. २१.४० )

**व्याधेरुपरियोव्याधिर्भवत्युत्तरकालजः ।**
**उपक्रमाविरोधीच स उपद्रव उच्यते ॥**
( सु. उ. ३९.२९० ).

**पूर्वोद्भवनिमित्तेन योऽपरो जायते गदः ।**
**तमुपद्रवमित्याहुः अतीसारो यथा ज्वरे ॥**
( कासु. २७.५७ )

एक व्याधि झाल्यानंतर लगेच दुसरा व्याधि होतो त्याला उपद्रव म्हणतात. रोगाच्या जवळ येतो तो उपद्रव. रोग प्रधान. उपद्रव अप्रधान. प्रथम प्रधानाची म्हणजे मूळ रोगाची चिकित्सा केल्याने बहुधा उपद्रव शमतो. पण तो जास्त उग्र असल्यास लवकर चिकित्सावा. त्याची चिकित्सा प्रथम करावी. ज्वरात झालेला अतिसार ज्वराचा उपद्रव होय.

**उपद्रुत**–वि. **उपद्रवव्याप्तः** ( सुशा. १०.९ ) उपद्रवाने व्याप्त. उपद्रवयुक्त. उपद्रव झालेला.

**उपधा–भोगतृष्णा०** ( चशा. १.९५ ) राग, द्वेष, भोग, तृष्णा इत्यादी.

**अन्यव्यपदेशः, व्याजः** ( चचि. ८.१५६ ) वस्तूचे ( मांसाचे ) असलेले नाव लपवून दुसरे नाव सांगणे.

**उपधातु**–पु., **धातोरुपादानभूताज्जातोऽन्यधातुः** ( चचि. १७.१७ ) रस धातूचा अंगावरचे दूध हा उपधातु ! रक्ताच्या कंडरा शिरा इत्यादी उत्पन्न होणारे शारीर घटक.

**खनिजद्रव्य०** ( ध. ७.८८ ) सुवर्णमाक्षिक, मोरचूद इत्यादी खनिज पदार्थ.

**उपधान**–न., **आवरणम्** ( चशा. ८.४३ ) आवरण.
**उपशीर्षकम्** ( सुचि. ३८.३ ) उशी; तक्या.

**उपधारण**–न., **विषयस्य बुद्धौ स्थापनम्** ( चवि. ८.२१ ) बुद्धीत एखादा विषय स्थिर करणे. धारण करणे. बलवान धारणाशक्तीचे कार्य.

**उपधिः**–पु., **छद्म** ( चवि. ४.८ ) छद्म, कपट, छल.
**लेप०मूर्ध्नि काकपदं कृत्वा विषहरणाय यत् दीयते** ( चचि. २३.५३ )
डोक्यावर शस्त्राने काकपद छेद करून त्यावर विषनाशक किंवा दोषनाशक लेप करणे.

**उपधेय**–वि., **यवाग्वादिद्रव्येषु आधायोपयुज्यमानः ।** ( चवि. ८.१३६ ) पेज, दूध इत्यादी स्वरूपात उपयोगात आणण्यासारखे पेय.

**उपनख**–न., **शारीरावयव० नखसमीपं स्थानम्** ( सुसू. २३.६ ) नखाजवळची जागा.
न., **रोग० चिप्पम्** ( सुनि. १३.२२ ) नखुरडे.

**उपनत**–वि., **सन्निधाने प्रणययुक्तः** ( सुसू. २.८ )
नम्र. शरणागत. नम्रता व आदराने जवळ आलेला.

**उपनन्द**–पु., **दिव्यसर्प०** ( असंउ. ४१ पृ. ३३० )
दिव्य जातीचा एक साप.

**उपनय**–पु., **न्यायावयव० उदाहरणापेक्षः तथेत्युपसंहारो न तथेति वा साध्यस्योपनयः । नित्यपुरुषानुमानेऽकृतत्वहेतौ 'तथा पुरुषः' इति वाक्यमुपनयः** ( चवि. ८.३१ )
पंचावयव वाक्यातील चवथा अवयव; "अन्वयी उदाहरणाप्रमाणेच पक्षहि साध्यव्याप्य हेतूचा आश्रय होय." किंवा "व्यतिरेकी उदाहरणाच्या उलट साध्यव्याप्य हेतूचा आश्रय होय" असे वाक्य.

**उपनयन**–न., **शिष्यस्य गुरोः समीपे वेदाध्ययनार्थं दीक्षाप्रदानम्** ( सुसू. २.३ )
**तद्विधिः–उपनयनीयं तु ब्राह्मणं प्रशस्तेषु तिथिकरणमुहूर्तनक्षत्रेषु प्रशस्तायां दिशि शुचौ समे देशे चतुर्हस्तम् चतुरस्रं स्थण्डिलमुपलिप्य गोमयेन दर्भैः संस्तीर्य पुष्पलाजभक्तैः रत्नैश्च देवताः पूजयित्वा विप्रान् भिषजश्च तत्रोल्लिख्य अभ्युक्ष्य च दक्षिणतो ब्रह्माणं स्थापयित्वाऽग्निमुपसमाधाय खदिरपलाशदेवदारुबिल्वानां समिद्भिश्चतुर्णां वा क्षीरिवृक्षाणां न्यग्रोधोदुम्बराश्वत्थमधूकानां दधिमधुघृताक्ताभिर्दार्वीहोमिकेन विधिना स्रुवेणाज्याहुतीर्जुहुयात् सप्रणवाभिर्महाव्याहृतिभिस्ततः प्रतिदैवतमृषींश्च स्वाहाकारं कुर्यात् । शिष्यमपि कारयेत् ।** ( सुसू. २.३ )
गुरुच्या जवळ नेणे. वेदाध्ययनाकरिता दीक्षा देण्यासाठी गुरुजवळ नेणे व दीक्षा देणे.
**विधि**–ज्याचे उपनयन करावयाचे त्या ब्राह्मणाला शुभतिथि नक्षत्र मुहूर्तावर पूर्व वा उत्तर दिशेला समतल स्वच्छ भूमीवर मातीचा चौकोनी ओटा करून गाईच्या शेणाने सारवून दर्भ अंथरावे. फुलें, लाह्या, अन्न व रत्न इ. देऊन देव, ब्राह्मण. वैद्यांचे पूजन करून दर्भांनी रेषा ओढाव्या, पाणी शिंपावे. उजवीकडे ब्रह्मदेवाची स्थापना करावी. अग्नि प्रज्वलित करून खैर, पळस, देवदार, बेल किंवा वड, उंबर, पिंपळ, मोह ह्या ४ क्षीरी वृक्षांच्या समिधा, दही, मध, तूप यात बुडवून होमहवन पद्धतीने त्या समिधांच्या व पळीने तुपाच्या आहुती देऊन प्रणव आणि महाव्याहृति मंत्रपूर्वक प्रत्येक देवता व ऋषींच्या नांवे स्वाहाकार करावा; गुरुने स्वतः करून शिष्याकडूनही हवन करवावे.

**उपनासिका**–वि., **( सिरा ) नासासमीपस्था** ( सुशा. ८.१५ ) नाकाजवळ असलेली शीर.

**उपनाह**–पु., **उपक्रम० स्वेद० उपनाहशब्दस्त्विह 'णह' बन्धने इत्यस्य इति उपनाहः ।** ( सुचि. ३२.१२ )
**उपनह्यते चर्मपटादिना इत्युपनाहः** ( अहसू. १७.२ )
**बहलं लेपं दत्वा चर्मादिभिराबृत्य व्याधियुक्तस्याङ्गस्य बन्धनम्** ( चसू. १४.३५ )
**विधिः–उपनाहस्तु वातहरमूलकल्कैरम्लपिष्टैर्लवणप्रगाढैः सुस्निग्धैः सुखोष्णैः प्रदिह्य स्वेदयेत् । एवं काकोल्यादिभिरेलादिभिः सुरसादिभिस्तिलाऽतसीसर्षपकल्कैः कृशरापायसोत्कारिकाभिर्वेशवारैः शाल्वणैर्वा तनुवस्त्रावनद्धैः स्वेदयेत्** ( सुचि. ३२.१२ )
एक चिकित्सा. शेकण्याचा प्रकार. 'णह' बांधणे धातूचा साधित शब्द. लेप जाडसर लावून चामडे इत्यादींच्या पट्ट्यांनी बांधणे. आंबट द्रवात वातहर द्रव्ये मीठ पुष्कळ घालून स्नेह मिसळून सोसवेलसे गरम बांधणे. यासाठी काकोल्यादी, एलादी, सुरसादी गणातील औषधे किंवा तीळ, जवस, मोहरी यापैकी योग्य ते द्रव्य वाटून त्याची किंवा खिचडी, घट्ट भात, दूध, तूप, औषधी द्रव्ययुक्त पोळी किंवा मांसाची वेसवार अथवा सालवण यातून योग्य ते द्रव्य पातळसर वस्त्रात बांधून पुरचुंडी करून शेकावे.
**नेत्ररोग० नेत्रे कृष्णदृष्टिमण्डलयोः ईषत्पाकः कण्डूप्रायो नीरुजो महान् ग्रन्थिस्वरूपः** ( सुउ. २.४ )
बुबुळाचा रोग. खाजयुक्त थोडी पिकणारी गांठ.

**चिकित्सा—उपनाहं स्विन्नं व्रीहिमुखेन भित्त्वा मण्डलाग्रेण लेखयेत् प्रतिसारणान्तरं च पिप्पल्यादिभिः उष्णेन वारिणा प्रक्षाल्य घृतेन सिक्तमभ्यक्तं मधुसर्पिषा ऊर्ध्वाधः कर्णयोश्च यवसक्तुभिः पिण्डीं दत्वा बध्नीयात् । तथा पटोलपत्रामलककाथेन चाश्चोतयेत्** (अहृउ. ११.१–२) (सुउ.१४.९–१०)
चिकित्सा (१) पुरचुंडीने शेकणे, व्रीहिमुखाने ह्या विकारविशेषाला फोडून मंडलाग्राने खरडून, पिप्पल्यादिगणातील औषधांनी तयार केलेल्या गरम पाण्याने धुवून तूप लावणे. (२) जवाच्या पिठात मध तूप घालून ती पिंडी डोळ्याच्या खाली वर कानाकडे बांधावी (३) पटोलपत्र आणि आवळीच्या पानांच्या काढ्यांचा धुणे व प्रोक्षणाकरिता उपयोग करावा.

**उपनाहन**—न., **स्वेद० उपनाहः** (सुउ. १२–४५)
शेक. पहा 'उपनाह' पोटीस, मलम, इत्यादी लावणे.

**उपनीत**—वि., **दत्तम्** (असंसू. ८) दिलेला, जवळ नेलेला.
**—बल**—वि., **अध्ययनात् प्राप्तं ज्ञानबलं येन सः** (असंसू. ९)
ज्याने अध्ययनाने ज्ञानबल मिळविले तो.

**उपन्यूषम्**—अ., **किञ्चिच्छेषायां रात्रौ** (चवि. ८.७)
थोडी रात्र असतांना.

**उपपक्ष्मक**—पु., **रोग० वर्त्मस्वन्यान्यधिकानि पक्ष्माण्युद्भवन्ति यस्मिन्** (असंसू. ४०.३)
पापणीचा एक रोग. यांत तिच्या केसांमध्ये निराळे केस येतात.

**उपपक्ष्मन्**—न., **नेत्रे पक्ष्मसमीपस्थमवान्तरपक्ष्म, उपपक्ष्मणां निर्हरणे षडङ्गुलसंदंश उपयुज्यते** (अहृसू. २५.८)
पापणीच्या केसांच्या जवळ निराळे उगवणारे लहान केस. हे उपटण्याकरिता संदंशयंत्र म्हणजे सहा अंगुळे लांब चिमटा वापरला जातो.

**उपपन्न**—वि., **सहितम्** (सुनि. १६.५४)
जवळ असलेले–आलेले, युक्त, सहित.

**उपपादन**—न., **संयोजनम्–सम्पादनम्** (परिव०) (सुचि. ५.७; असंशा. ४)
देणे, मिळविणे, जुळविणे, सिद्ध करणे, सिद्धीस नेणे.

**उपपादनीय**—वि., **उपक्रमणीयः, शरीरबलादिसम्पद्युक्तः** (चवि. ७,१६)
वांती, रेचक, इत्यादी पंचकर्मे आणि चिकित्सा करण्यास योग्य. शक्ति, धैर्य इत्यादी गुणयुक्त.

**उपप्लव**—पु., **दुःखागमः** (चशा. ५.८)
संकट ओढवणे, दुःख येणे.
**वृद्धिः, दूषणम्** (सुचि. १.४)
वाढ, कोप, दूषित होणे.

**उपप्लुता**—स्त्री., **योनिरोग० गर्भिण्याः श्लेष्मलाभ्यासेन छर्दिनिःश्वासनिग्रहात्क्रुध्दो वायुरुपनीय कफं योनिं प्रदूषयेत् । पाण्डुमास्रावं श्वेतं कफं सतोदं स्रवति । कफवातामयव्याप्ता योनिरुपप्लुता कथ्यते ।** (चचि. ३०.२१–२२)
(अरु. अहृउ. ३३.४८–४९; असंउ. ३८ पृ. २९३)
पांढरा कफयुक्त, पीडायुक्त स्राव होणारी योनि. कारणे–गर्भिणीने कफकारक पदार्थांचे सेवन करणे, वांती न होऊ देणे, श्वासाचा अवरोध करणे यामुळे कुपित वात कफाला घेऊन योनीत दोष उत्पन्न करतो, त्यामुळे योनीतून भुरकट स्राव, पांढरा कफ टोचणीयुक्त स्रवतो. कफवातविकाराने व्यापलेल्या ह्या योनीला उपप्लुता म्हणतात.

**उपभूत**—पु., **वनस्पति० नीलि** (ध. १.२३३)
नीलिनी, काळा दाणा.

**उपमर्द**—पु., **मृदूकरणम्** (काशा. जातिसूत्रीयः (पृ.८५)
नरम करणे, मऊ करणे.

**उपमान**—न., **प्रमाण० प्रसिद्धसाधर्म्यात्सूक्ष्मव्यवहितविप्रकृष्टस्यार्थस्य साधर्म्यसाधनम्** (सुसू. १.१६)
उपमेचा प्रमाण म्हणून उपयोग करणे. वक्ता व श्रोता यांना मान्य असलेल्या साधर्म्यावरून सूक्ष्म, दूर असलेल्या व न दिसणाऱ्या वस्तूंचे साधर्म्य दाखविणे.

**उपयन्त्र**—न., **शरीराङ्गे धमन्यादिकेऽवयवे वोपयुज्यमानानि द्रव्याणि । तानि च पञ्चविंशतिप्रकाराणि । स्वल्पयंत्रकार्यकरणादुपयन्त्राणि । रज्जुवेणिकापट्टचर्मान्तर्वल्कललतावस्त्राष्ठीलाऽश्ममुद्गरपाणितलपादतलाऽङ्गुलिजिह्वादन्तनखमुखबालाऽश्वकटशाखाष्ठीवनप्रवाहणहर्षायस्कान्तक्षाराऽग्निभेषजानीति । उपमितानि यन्त्रैरिति उपयन्त्राणि । अनुयन्त्राणीति वाग्भटे पाठः** (सुसू. ७.१५)
धमन्या इ० अवयवांसाठी उपयोगात आणावयाच्या वस्तु २५ प्रकारच्या आहेत. यंत्राचे लहानसे काम करतात म्हणून त्यांना उपयंत्र म्हणतात. मुंज इ. गवताची वळलेली दोरी. चामड्याच्या ३ तंतूंची विणलेली दोरी; पट्टा, पातळ चामडे, झाडाची पातळ साल, वेलीचे ताणे, वस्त्र, आठळी, गोल चपटा दगड,

लाकडी मोगरी, हात, पाय व त्यांचे तळवे, बोटे, जीभ, दात, नखे, तोंड, केस, घोड्याचा लगाम, झाडाची फांदी, थुंकण्याची, कुंथण्याची क्रिया, आनंदवृत्ति, लोहचुंबक, क्षार, अग्नि, निरनिराळी औषधे व यंत्राचे तात्पुरते तरी काम भागविणारी साधने ही सर्व उपयंत्रे होत. वाग्भटाने यांना अनुयंत्र म्हटले आहे.

**उपयुयुक्षु**–वि., **उपयोगं कर्तुमिच्छुः, उपयोक्तुम् इच्छुः** ( सुचि. २९.१० )
उपयोग करण्याची इच्छा असलेला.

**उपयोक्तृ**–वि., **यः किमप्युपयुङ्क्ते सः** ( चवि. १.२२ )
उपयोग करणारा. आहाराचा उपयोग करणारा.

**उपयोग**–पु., **भोजनं, सेवनमाचरणम्** ( चवि. १.१५ )
उपयोग, सेवन, आचरण करणे, भोजन करणे.

**–नियम**–पु., **आचारपद्धतिः, आहारोपयोगः एवं कर्तव्यं एवं च न कर्तव्यं इत्येतादृशविवेचनात्मिका पद्धतिः** ( चवि. १.२१ ( ७ )
उपयोगाचे नियम. वापराची पद्धति. हे करावे, हे करू नये अशी विवेचनात्मक पद्धती–नियम.

**–व्यवस्था**–स्त्री., **उपयोगनियमः** ( असंसू. १०.१६ )
उपयोगाचे नियम. योग्यायोग्य विचारानुसार उपयोगाची व्यवस्था.

**–संस्था**–स्त्री., **उपयोगनियमः** ( चवि. १.२२ ( ७ )
उपयोगनियम.

**उपयोजन**–न., ( **परिव** ) **उपयोगः** ( सुचि. ३१.५ )
( डल्हण सुचि. ३१.१ ) उपयोग.

**उपरतकायाग्नि**–वि., **नष्टजाठराग्निः** ( चवि. २.१३ )
ज्याचा पाचकाग्नि नष्ट झाला आहे असा.

**उपरत्न**–न., **रत्न०** ( ध. ७.९१ )
काच, शंख इत्यादि उपरत्ने.

**उपरम**–पु., **विनाशः, शमनम्** ( चसू. १६.२७ )
शांती. नाश, शमन.
**निवृत्तिः** ( चशा. ५.८ ) दूर होणे, शांत होणे.

**उपरस**–पु., **खनिजद्रव्य वि०** ( ध. ७.९३ )
**सप्त चैते उपरसास्ते च गन्धतालककासीसशिला-कंकुष्टभूषणराजावर्ताः गैरिकं च** ( र. ६.४२ )
कांही खनिज द्रव्ये. ती ७ आहेत. गंधक, हरताळ, मनशीळ, कंकुष्ट, पोवळे, राजावर्त आणि गेरू.

**उपराग**–पु., **ग्रहणं, राहुग्रहः** ( असंशा. १२.५ )
अमावास्या पौर्णिमेला होणारे सूर्यग्रहण. राहु ग्रह.

**उपरिज**–वि., **उपरिजातः, उपरिस्थः** ( सुचि. २२.२७ )
वर असलेला, वर उत्पन्न झालेला ( दांत )

**उपरुद्धायुस्**–वि., **गतायुः, समाप्तायुः** ( चइं. ९.४ )
खुंटलेल्या आयुष्याचा. मरणोन्मुख, आसन्नमरण.

**उपरूढ**–वि., **विरूढम् अव्रणीभावमागतम्** ( सुचि. ८.५ )
रुझलेला, भरून आलेला ( व्रण ) बरा झालेला.

**उपरोधन**–न., **पीडा, ग्रहः** ( अहसू. ४.३ ) अडवणे.

**उपल**–पु., **पाषाणः** ( सुसू. २९.९–१५ )
**अश्मा** ( असंउ. १२.४ ) दगड, धोंडा, वाळू.
न., **वन्यच्छगणम्** ( र. ५.१८ )
रानशेणी, रानगोवरी.

**–कान्त**–न., **कान्तपाषाणः** ( र. १७.१३५–३६ )
कांतपाषाण, लोहचुंबक.

**–भेद**–पु., **वनस्पति० पाषाणभेदकः** ( ध. १.१५७ )
पाषाणभेद, एक वनस्पती.

**–( भेदी )**–स्त्री., **उपलभेदः** ( रा.५.२०९ ) पाषाणभेद.

**–सन्धी**–स्त्री., **अल्पं वन्यच्छगणम्** ( र. १०.५४-५५ )
लहान रानशेणी, रानशेणीचा तुकडा.

**–साठी**–स्त्री., **उपलाः कठिना महान्तो वन्यच्छगणाः, ततोऽल्पदेहाः साव्यः** ( र. १०.५४–५५ )
उपला म्हणजे मोठी रानशेणी, मोठी रानगोवरी; तिच्यापेक्षा लहान असतात त्या सावी.
**शुष्कच्छगणम्** ( र. ७.१८ )
सुकलेली रानगोवरी, सुकी रानशेणी.

**–सारी**–स्त्री., **छगणम्** ( र. १०.६६ ) गोवरी, शेणी.

**उपलेप**–पु., **आवरण० लेपः** ( चनि. ५.१० )
**मलवृद्धिः स्रोतःसु ।** ( सुचि. ३७.९१ )
लेप. आवरण. स्रोतसात होणारी मलवृद्धी.

**उपलेपन**–न., **लेपनम्** ( सुचि. २७.८ ) लेप करणे.

**उपवर्णन**–न., **ख्यापनम्** ( सुउ. ६५.३३ )
सांगणे, कथन.

**उपवात**–पु., **अल्पवातः** ( चशा. ८.२४ ) थोडा वात.

**उपवान**–वि., **उपशुष्कम्** ( असंउ. १ ( पृ. ३)
थोडे सुकलेले. कांही सुकलेले.

**उपवास**–पु., **उपक्रम० अथर्ववेदे चिकित्सा०** ( चसू. ३०.२१ ) **भोजनपरित्यागः अस्यापि संशमनीयत्वम्** ( सुउ. ३९.१३४ )
एक चिकित्सा. अथर्ववेदोक्त चिकित्सा; अनशन जेवण सोडणे ही शमनचिकित्सा.

**–शोष**–पु., **रोग० क्षुत्प्रभृतिभिः उपशोषितः** ( सुसू. १५.३३ )
लंघनाने सुकलेला, उपवास इत्यादींनी कृश झालेला.

**उपविष**–न., वानस्पत्यो विषभेदः अर्कक्षीरं स्नुहीक्षीरं लाङ्गली करवीरकं गुञ्जाऽहिफेनो धत्तूरः इत्येताः सप्त उपविषजातयः

लाङ्गली विषमुष्टिः करवीरं जया नीलकः कनकोऽर्क-श्चेत्युपविषवर्गः ( र. १०.८७ )

विषतिन्दुकबीजमहिफेनं रेचकं धत्तूरबीजं विजया गुञ्जा भल्लातकोऽर्कक्षीरं स्नुहीक्षीरं लाङ्गली करवीरकः इत्यपि गणो मतः ( ध. ७.१३० )

वनस्पति विषांतील उपविषे. रुईचे दूध, त्रिधारी निवडुंगाचे दूध, कळलावी, कण्हेर, गुंजा, अफू, धोतरा, ही सात. कळलावी, कुचला, कण्हेर, भांग, नीली, धोतरा, रुई ही सात. कुचलाबी, अफू, जयपाळ, धोतरा, भांग, गुंजा, रुईचे दूध, त्रिधारी निवडुंगाचे दूध, कळलावी, कण्हेर, बिब्बा हाही एक गण.

**( उपविषा )**–स्त्री., वनस्पति० अतिविषा ( ध. १.१० )

अतिविष, अतीस.

**उपविष्टक**–न., गर्भरोग० सञ्जातसारे महति च गर्भे गर्भिण्या अपथ्यसेवनाद् योने रक्तरूपोऽन्या-दृशोऽपि परिस्रावो भवति तदा गर्भवृद्धिर्न भवति वृद्धिमप्राप्नुवन् गर्भः गर्भाशये एव तिष्ठति । योनिपरिस्रावात्कुपितो वायुः पित्तश्लेष्माणौ परिगृह्य गर्भस्य रसवहां नाडीं प्रतिपीड्याऽवतिष्ठते दोषप्रति-च्छन्ननाड्यां रसस्य असम्यग् वहनान्नाडीरोधाद्गर्भस्य वृद्ध्यभावो गर्भश्च सस्फुरस्तिष्ठति । तं तथाविधं गर्भमुपविष्टकमाहुः । तेनोदरं न वर्धते ।

( अहृशा. १४–१५ )

( असंशा. ४.११; र. २२.२८–२९ )

संख्यासम्प्राप्तिः–उपविष्टको वातेन पित्तेन कफेन च त्रिविधा भवति ( असंशा. ४ )

सामान्यचिकित्सा–जीवनीयबृंहणीयमधुरौषधसिद्धा-नां सर्पिषां तथा पयसां रसानामामगर्भाणां च उप-योगः गर्भवृद्धिकरः । तथा सम्भोजनमेतैरेव च घृतादिभिः । सुभिक्षाया अभीक्ष्णं यानवाहनादिभिः क्षोभणमार्जनजृम्भणैरुपपादनम् ( असंशा. ४ ) एवं गर्भो न वर्धते तदा गर्भिणीं तीक्ष्णैर्द्रव्यैर्विरेचयेत् । अपरापातनीयैर्वा प्रयोगैर्गर्भं पातयेत्

( इन्दु असंशा. ४.१२–२२ )

एक गर्भरोग. गर्भ मोठा व सर्व धातू परिपुष्ट असताना गर्भिणीने अपथ्य सेवन केल्याने पुढे त्याची वाढ थांबते. त्यामुळे गर्भ वाढत नाही. गर्भाशयातच राहातो. स्रावामुळे प्रकुपित वायु कफपित्तांसह रसवहनाडी मध्ये अवरोध उत्पन्न करतो, त्यामुळे रस नीट वाहत नाही, पोषण नीट न झाल्यामुळे गर्भाची वाढ खुंटते, गर्भाचे स्फुरण मात्र होते. त्याला उपविष्टक म्हणतात. यामुळे पोटही वाढत नाही. याचे प्रकार तीन. वातज पित्तज, कफज.

**उपचार**–जीवनोपयुक्त पौष्टिक गोड औषधांनी तयार केलेले तूप किंवा दूध किंवा मांसरस आणि अंडी यांचा उपयोग करावा. ही तुपे दुधे खाण्यात व इतर पदार्थात उपयोगात आणावीत. जेवण पोटभर झाल्यावर वारंवार वाहनात बसून शरिराला धक्के बसतील असे मार्गक्रमण करावे. असे करूनही गर्भ न वाढला तर तीक्ष्ण रेचकाने रेच करवावे, किंवा वार पाडण्याच्या प्रयोगांनी गर्भपात करावा.

**उपवेशन**–न., आसना, उपविष्टस्थितिः

( काखिल. अ. १२.८–१४ )

( परिव० ) अतिसरणं, मलविसर्जनम्

( सुचि. ३६.४० )

( परिव० ) बालकस्य संस्कार० किष्कुद्वयमात्र-लिप्तायां धरण्यां धरण्यादिस्वाहान्तेन मन्त्रेण चतुर्दिशं बलिं दत्वा पञ्चमे मासि पुण्येऽहन्युपवेशयेत्

( असंउ. १ पृ. ९ )

अत्युपवेशनाच्च इमे दोषा अतिबालस्य रोगिणो वा समुत्पद्यन्ते । स्तैमित्यं कटिदौर्बल्यं पृष्ठभङ्गः श्रमो ज्वरो विण्मूत्रानिलसंरोधाध्मानम् ।

अतिबालस्य च निर्घातं गात्रभेदनं । निर्घातजर्ज-राङ्गत्वं तेन वेदना, तया च ज्वरसम्भवस्तस्माच्च बालस्य कठोराङ्गत्वं वृद्धिश्च तस्य न भवति । अन्यच्च यस्य बालश्चिरोपवेशनात् मक्षिकाकृमिकीटसर्पाखु-नकुलवेलाझञ्झानिलादीनां गम्यो भवति ।

( कासंखिल अ. १२.९–१४ )

बसणे, बसण्याची स्थिति. अति सरणे–सारक होणे–मळ जाणे.

बालकाचा एक संस्कार. दोन हात लांबीच्या व रुंदीच्या सारवलेल्या जमिनीवर धरणी इत्यादि स्वाहान्त मंत्र म्हणून चारही दिशांना बली देऊन पांचव्या महिन्याला पुण्यकारक दिवशी बालकाला बसवावे. अगदी लहान मुलाला किंवा रोगी मुलाला

किंवा पांच महिन्याच्या मुलाला पुष्कळ वेळ बसविले तर **होणारे दोष**–हालचाल बंद होणे, कंबर दुबळी होणे, पाठ मोडणे, थकवा, ताप, मल मूत्र वात यांचा अवरोध व पोटफुगी. **फार लहान मुलास बसविले तर** अंग हालते, मूल पडते, त्याने अंग जर्जर होते, वेदना, ताप येऊन मुलाचे अंग कठोर होते व वाढ होत नाही. तसेच माशा कृमी किडे, झंझावात, सर्प, उंदीर मुंगुस इत्यादींची बाधा होते.

**उपशम**–पु., **शान्तिः** ( सुचि. ३१.१२ )
नाश, शांति, दोष निवृत्ति; प्रकुपित दोषांचे शमन.

**उपशमनीय**–वि., **योगः बृंहणम्** ( चसू. २६.८ )
**शामको योगः** ( चचि. १९.५० )
एक योग. त्या त्या दोषांचे शमन करणारा योग. बृंहण करणारे योग.

**उपशय**–**व्याध्युपलब्धिकारण० हेतुव्याधिविपरीतानां विपरीतार्थकारिणां चौषधान्नविहाराणामुपयोगः सुखानुबन्धः ।** ( चनि. १. ६. )
रोगाच्या निश्चित केलेल्या निदानाचा पडताळा पाहून ते अधिक निश्चित ठरविण्याचे साधन. ( १ ) कारण विपरीत ( २ ) रोग विपरीत ( ३ ) कारण व रोग-विपरीत. ( ४ ) कारणाशी स्वतःच्या विपरीत कार्य म्हणजे सम असून रोग शमन करणारे. ( ५ ) रोगाशी सम असून स्वतःच्या विपरीत कार्य म्हणजे रोग शमन करणारे. ( ६ ) रोगकारण व रोग या दोहोंशी समान असून दोहोंच्या विपरीत कार्य करणारे. वरील सहा प्रकारचे उपयोग, सुखावह (आरोग्यदायक) होत राहाणारे आहार विहार व औषधी यांना उपशय म्हणतात.

**उपशान्त**–वि.. **लीनीभूतः** ( सुशा . १०.५७ )
शांत झालेले दोष. स्रोतसात, अवयवात सुप्त झालेले दोष. वेदना उत्पन्न करण्याचे सामर्थ्य कमी झालेले दोष.

**उपशीर्षक**–पु., **बालरोग० वातदुष्टे कपाले देहसमान-वर्णो रुजारहितः शोफो भवति स उपशीर्षकनामा रोगः । गर्भस्याप्ययं रोगो भवति**
( असंउ. २७. पृ. १९८ )
( अहृउ. २३.२१ ) **चिकित्सा–उपशीर्षके नवे जन्मोत्तरं जाते वातव्याधिचिकित्सितं कुर्यात् । पक्वे च विद्रधिविहितं कर्म कुर्यात्**
( अरु. अहृउ. २४. १९–२० )
**अभ्यक्तं च स्वेदयित्वोपनाहयेद्यथा विदाहो न भवति** ( असंउ. २८. ( पृ. २०४ )
**उपशीर्षक**–एक बाल रोग. वात दुष्ट होऊन डोक्याच्या कवटीवर शरिराच्यावर्णासारखी वेदना-रहित सूज होते ती उपशीर्षक. गर्भालाही हा रोग होतो.
**चिकित्सा**–जन्मानंतर नवीन अशा रोगावर वात-व्याधीची चिकित्सा करावी. पक्व झाल्यावर विद्रधी-प्रमाणे उपचार करावे. तेल लावून शेकावे आणि ती पिकू नये अशा बेताने पोटीस बांधावे.

**उपशुष्कक**–पु., **गर्भरोग० नागोदरपर्यायः । प्रतिमास-मार्तवात् प्रत्यहं वाऽतियोनिस्रावाद्गर्भो वृद्धोऽपि परिहीयते । स चिरात्किञ्चित्स्पन्दते । कुक्षिश्च वृद्धोऽपि परिहीयते ।** ( असंशा. ४.११ )
**चिकित्सा–उपविष्टकवच्चिकित्सा कर्तव्या ।**
( असंशा. ४.१३ )
उपशुष्कक रोग. याला नागोदरही म्हणतात. गर्भिणीला प्रत्येक महिन्याला किंवा दररोज योनिस्राव झाल्यामुळे वाढलेला गर्भ सुद्धां क्षीण होतो. तो केव्हातरी किंचित स्फुरण-स्पंदन पावतो. वाढलेले पोटही लहान होते. उपविष्टकासारखी चिकित्सा करावी.

**उपशोष**–( परिव० ) पु., **लक्षण० कर्शनम्**
( असंशा. ४. चनि. ६.१० ) सुकवणे, कृश करणे.

**उपशोषण**–न., **उपशोषः** ( चनि. ६.१० )
सुकवणे, कृश करणे.
वि. **शोषकः, आर्द्रताविनाशकः**
( चसू. २६.४२.५ )
शोषण करणारा सुकविणारा, आर्द्रता नाहीशी करणारा.

**उपश्लेष**–पु., **सान्निध्यम्, सन्निपातादिज्वरनिदानम्**
( चनि. १.२८ )
सन्निध असणे, जवळ असणे (डोंगर किंवा पर्वताच्या) हे सन्निपातज्वर इत्यादिकांचे कारण आहे.

**उपष्टब्ध**–वि., **धारितः, बलयुक्तः** ( चशा. ६.२३ )
धारण केलेला, बलवान.

**उपष्टम्भन**–न., **उपस्तम्भनम्, आधारः, आलम्बनम्,**
( असंसू. ९.३६ ) धारण करणारा.

**उपसन्धान**–( परिव० ) न., **आरोपणम्, उपरि समीपे वा स्थापनम्** ( सुचि. ३२.१० )
ठेवणे, वर किंवा जवळ ठेवणे.

**उपसंभृत**–वि., **समीपस्थापितम्** ( सुसू. ११.१८ )
जवळ ठेवलेले.

**उपसर्ग**–पु., **उपद्रवः** ( चचि. २२.७ )
उपद्रव, रोगात होणारा रोग.
**अन्यरोगाभिषङ्गः** ( असंनि. ५.५९ )
रोगाशी–रोग्यांशी संपर्क आल्याने झालेला. संपर्कजन्य.
**संक्रामकः ज्वरादिरोगः अमानुषोपसर्गादयः** ( सुउ. १.६ )
संसर्ग किंवा स्पर्शाने पसरणारे. ज्वरादि रोग. दैव किंवा भूतबाधाजन्य.
**व्याकरणे धातोः पूर्वमुपयुज्यमानाः क्रियासंबन्धसूचकाः प्रादयः** ( सुचि. २.९६ )
व्याकरणात धातूच्या पूर्वी लावलेले क्रियेचे संबंधसूचक. प्र, वि, अप इत्यादी.
**–ज**–वि., **रोगपीडितसमीपवर्तिनो जायमानो ज्वरादिरोगः** ( सुसू. २४.७ )
रोग्याच्या संपर्कात असलेल्या व्यक्तीला झालेला ज्वर.
**–संज्ञा**–स्त्री., **अनर्थहेतुत्वभावना** ( चशा. ५.१२ )
अनर्थाच्या हेतूची भावना.

**उपसर्गात्मिका**–वि., स्त्री., **तृष्णारोग०** ( चसू. १९.४–(४) )
ज्वरादी रोगांमध्ये उपद्रव म्हणून होणारी ( तहान )

**उपसर्जन**–न., **ग्रहणम्** ( असंक त. प्र. पृ. १३८ ) ग्रहण, घेणे, येणे.
**संसर्गः** ( चक. १.२१ ) संसर्ग. संबंध.

**उपसंस्कृत**–वि., **विशुद्धम्** ( सुचि. २७.८ )
दोष काढून टाकलेले–विशुद्ध ( शरीर )

**उपसंहरण**–न., **एकत्राऽऽहरणम्** ( सुचि. ३.६ )
एकत्र करणे, एकत्र करून उपयोग करणे.

**उपसंहित**–वि., **संधिना युक्तम्, अनुकूलम्** ( चवि. ८.२५ ) संधि असलेला, अनुकूल.

**उपसि (शि) ङ्घन**–न., **उपक्रम० चूर्णादीनामाघ्राणम्** ( सुउ. ५५.२९ )
नस्य. नाकाने औषध हुंगणे. नाकात चूर्ण इत्यादी घालणे.

**उपसूत**–पु., **उपरसः** ( र. १२.१४ )
उपरस, गन्धक इत्यादी.

**उपसृष्ट**–वि., **संयुक्तम्** ( सुशा. २.५ )
संयुक्त, मिसळलेले, दूषित, दुष्ट झालेले.
**गृहीतम्** ( सुउ. २८.३ )
धरलेले. घेतलेले; ताब्यात घेतलेले, पीडलेले.

**उपसेक**–पु., **अन्नस्योपरि तक्रादिना सेचनम्** ( चनि., २.४ )
अन्नावर ताक, दूध, इत्यादी शिंपडणे.
**व्यञ्जनम् येन मिश्रीकृत्यौदनादि भुज्यते** ( अहृसू. ६.१७ )
ज्यांचेशी भात, भाकरी, इत्यादी कालवून खाल्ला जातो किंवा खातांना रुचीसाठी तोंडी लावावयाचे असते ते–कालवण, चटणी, कोशिंबीर इ०

**उपसेवन**–न., **भोजनम्** ( चसि. ४.४२ )
जेवण, जेवण करणे, पथ्य सेवन करणे.
**व्यञ्जनम्** ( चचि. १९.११५ )
वरण, आमटी, ताक, चटणी, कोशिंबीर इत्यादी.

**उपस्कर**–पु., **उपकरणद्रव्यम्** ( असंशा. १२.१३. )
**सामग्री** ( र. ७.३४ ) साधन. सामान, सामग्री.

**उपस्कृत**–वि., **संस्कारादिभिः संस्कृतम्** ( चवि. ८.८७ )
फोडणी दिलेले, मसाला घातलेले, संस्कार केलेले.
**–क्षीर**–न., **भेषजैः संस्कृतं दुग्धम्** ( चशा. ८.३२ )
संस्कार केलेले–वेलदोडा, जायफळ इत्यादी घातलेले दूध, किंवा औषधांनी सिद्ध केलेले दूध.
**–तनु**–वि., **संस्कृतशरीरः** ( अहृसू. १७.१८ )
संस्कार केलेल्या शरिराचा.
**–भेषज**–न., **संस्कृतमौषधम्** ( चवि., ८.८७ )
संस्कार केलेले औषध.

**उपस्तम्भ**–पु., **स्तम्भ० शरीरधारको भावः** ( चसू. ११.३४ )
**अवरोधः, अवष्टम्भः** ( सूचि. ३८.१६.१७; )
**शरीरधारणम्, ' पुरीषमुपस्तम्भं करोति** ( सुसू. १५.६ )
शरिराचा धारक धर्म. अवरोध. आधार. धारण करणे. आधार देणे.
**स्तब्धता** ( सुउ. ४२.१२४ ) स्तब्ध होणे.
**–त्रितय**–न., **आहारः स्वप्नोऽब्रह्मचर्यम् एभिरुपस्तम्भैः शरीरं बलवर्णोपचयोपचितमनुवर्तते यावदायुषः संस्कारः ।** ( असंसू. ९.३६ )
शरीर आहार, झोप आणि स्त्रीसेवन या तीन आधारावर आयुष्यभर बल, वर्ण व पुष्टि मिळवून कालक्रमणा करीत असते.

**उपस्थ**–पु., न., **कर्मेन्द्रिय०** ( चशा. ७.७ )
**जननेन्द्रियम्** ( सुशा. १.४ )
**मेढ्रं पुरुषाणां, योनिः स्त्रीणाम्** ( सुसू. १५.९ )
एक कर्मेंद्रिय–जननेंद्रिय, पुरुषाचे लिंग, स्त्रीची योनि.

**उपस्थातृ**–पु., **परिचारकः** ( चसू. ९.३ )
परिचारक, सेवक, रोग्याचा सेवक. शुश्रूषा करणारा.

**उपस्थान**–न., **सांनिध्यम्, रक्षणम्** ( चशा. १.१४६ )
सांनिध्य, जवळ असणे, रक्षण.

**उपस्थित**–वि., **प्रत्यासन्नम्** ( चशा. ६.२४ )
संनिध असणारा, जवळ असलेला.

**–काल**–पु., **प्रत्यासन्नकालः** ( चशा. ६.२४ )
जवळ आलेला काळ, वेळ.

**–गर्भा**–स्त्री., **निकटीभूतगर्भा, आसन्नप्रसवा** ( असंशा. ३.१८ ) लवकरच प्रसूत होणारी स्त्री.

**–प्रसवा**–स्त्री., **आसन्नप्रसवा** ( सुशा. १०.७ )
**प्रसवोत्सुका,** ( भाप्र. ) **गर्भपः; अद्य वा श्वो वा यस्या गर्भिण्याः प्रसवः बालजन्म भवति सा** ( अहृशा. १.७४ )
थोड्या वेळात प्रसूत होणारी, आज उद्यां बाळंत होणारी.

**–श्रेयस्त्व**–न., **अचिरादेव प्राप्तकल्याणता " उपस्थित-श्रेयस्त्वं श्रेयस्करमार्गानुष्ठानेन परीक्षेत "** ( चवि. ४.८ )
लवकरच प्राप्त होणारे कल्याण. लवकरच मिळणाऱ्या श्रेयाचा भाव. धर्मश्रेयता. श्रेय मिळविण्याचा मार्ग कसा चोखाळला गेला आहे त्यावरुन उपस्थित श्रेयस्त्व परीक्षावे.

**उपस्नेह**–पु., **निःस्यन्दः, उपलेपः** ( चशा. ६.२३ )
स्राव, उपलेप, चोपडलेला पदार्थ.
**सूक्ष्मायनैराप्यायनमुपस्नेहः** ( गयी सुनि. ३.२४ )
सूक्ष्म स्रोतोमार्गाने पोषण होणे.
**स्निग्धत्वम्** ( असंशा. २.३३ ) स्निग्धता, स्नेहयुक्तत्व.

**उपस्नेहन**–( परिव० ) न., **पुष्टिः** ( सुशा. ७.३ )
पोषण, पुष्टि.

**उपस्नेह्य**–वि., **उपस्नेहयोग्यः** ( कासिद्धि. अ. ७ पृ. १६७ )
ज्याचे पोषण केले पाहिजे तो.

**उपस्पर्शन**–( परिव० ) न., **आचमनम्** ( सुचि. २९.१० )
आचमन, चूळ भरणे.
**उदकस्पर्शनम्** ( सुचि. २९.१० )
पाण्याला स्पर्श करणे.
**स्नानम्** ( परिव० ) ( चसू. ८.१८ ) स्नान करणे.

**उपस्वेद**–पु., **विरलाल्पबाष्पसंयुतो वातः, आर्द्रता** ( चक. १.११ ) आर्द्रता, ओलावा, उष्ण ओलावा.
अल्प विरल वाफयुक्त हवा. उबारा.
**धर्मः, सगर्भवृत्तिसाधनम्** ( चशा. ६.२३ )
उष्ण ओलावा. उबारा. हा गर्भजीवनाला साधक आहे.

**उपस्वेदन**–( परिव० ) न., **स्वेदनम्** ( सुचि. २७.८ )
वाफारा. घाम काढणे.
( परिव० ) **पाचनम्** ( सुचि. ३२.११ )
वाफेवर शिजविणे.

**उपहत**–वि., **दूषितम्** ( सुचि. ६.१७ )
दोष उत्पन्न झालेले. दोषयुक्त, दूषित.

**–भल्लातक**–पु., **कृम्यादिर्दूषितो भक्षितो वा भल्लातकः** ( सुचि. ६.१७ )
बिघडलेला भिलावा. किडका भिलावा.

**–मनस्**–वि., **उपहतं दूषितं मनो यस्य सः** ( चनि. ७.४ ) दूषित मनाचा. कलुषित मनाचा.

**–वासस्**–( परिव. ) वि., **मलिनवासाः** ( चसू. ८.१८ )
मळकट वस्त्राचा. घाणेरडे कपडे घातलेला.

**उपहार**–पु., **आहार० नैवेद्यः देवादीनां शान्त्यर्थम्** ( चनि. ७.१६ ) नैवेद्य.
**देवादिषु गवाश्वप्रभृतीनामुपायनम्, अन्ये-उपहारो देवतानां सपशुर्बलिः** ( सुसू. ६.२१ ( ड. )
देवादिकांना तसेच गाय घोडा इत्यादिकांना द्यावयाचा नैवेद्य; देवतांना पशुरूप बली. गाई घोड्यांना गोग्रास इ०
**दानम्** ( चचि. ९.२३ ) दान.
**धूपदीपादिकं पूजोपकरणम्** ( सुक. ५.१२ )
धूपदीप इत्यादी पूजाप्रकार. पूजेची उपकरणे. पूजेचे षोडशोपचार. पंचोपचार.

**उपहित**–( परिव० वि., ) **उपधानसहितम् ' न अनुपहितं शयनं प्रपद्येत '** । ( चसू. ८.१९ )
उशीसह. उशी घेतल्यावाचून झोपू नये.

**उपाकरण**–न., **मन्त्रसंस्कारः, यथा पशोर्देवतार्थत्वेन कल्पनम् अभिमन्त्र्य पशोः क्रतौ हननं च** ( चचि. १९.४ )
मंत्राचा एक संस्कार, देवाला पशु देणे, अर्पण करणे, यज्ञात मंत्र म्हणून पशूचा बळी देणे.

**उपाङ्ग**–न., **अङ्गमेवाल्पत्वादुपाङ्गम् । तद्यथा देहस्य बाहुजङ्घे शिर इत्यङ्गानि, करचरणनासिकादीन्युपाङ्गानि, अङ्गसमीपमित्येके** ( सुसू. १.६ )
लहान-अंग, अंगविभाग, सगळा हात, पाय व डोके हीं अंगे होत. पंजा, घोट्याखालचा पाय. नाक, डोळे ही उपांगे होत. मोठ्या अंगाची लहान अंगे.
( परिव० ) पु., **स्नेहः स्नेहदानम्, उप समीपे अंज्यते लिप्यते अनेन इति उपाङ्गः नाम स्नेहः** ( चवि. ३.३८ ) **यथा रथांगस्य उपाङ्गेन स्नेह-**

**दानेन दृढत्वं भवति** ( चसू. ५.८५ )
तेल, तूप इ० स्नेह. स्नेह देणे, उप म्हणजे जवळ अंगाला अंज्यते म्हणजे माखले जाते, चोपडले जाते ज्याने तो उपांग म्हणजे स्नेह. रथाच्या चाकाला ( रथाच्या अंगाला ) तेलाने स्नेह दिल्याने–वंगण दिल्याने ते बळकट होते, घर्षणावाचून चालते म्हणून ते उपांग होय. वंगण.

**उपात्त**–वि., **प्राप्तम् , अदृष्टादागतम्** ( असंसू. ८.६ )
प्राप्त. मिळालेले. नशिबाने लाभलेले.

**उपादान**–(परिव०) न., **कारणम्, आधारः, अर्थः, आश्रयः** ( चशा. १.१३५ )
कारण, आधार, आश्रय, अर्थ.
**समवायि कारणम् , यथा घटस्य मृत्तिका** (र. १०.३)
समवायी कारण, जसे माती हे मडक्याचे कारण आहे तसे.

**उपाध्याय**–पु., **वैदिककर्माऽभिज्ञो याज्ञिकः** ( सुशा. २.२७ ) वैदिक व धार्मिक कर्मे जाणणारा

**उपानत्क**–वि., **सपादत्राणः** ( सुचि. २४.८९ )
पायतण, पादुका, जोडे. वहाणा, बूट, इत्यादी घातलेला.

**उपानह**– स्त्री., **पादत्राणम्** ( सुचि. २४.७३ )
**चर्मपादुका** ( इन्दु. असंसू. ३ )
**पादहिता** ( सुसू. २९–९ )
**चर्मकृतं पादत्राणम्** ( असंसू. ८.४३ ) ( इन्दुः )
**गुणाः––अन्वर्थसंज्ञं पादत्रं बलदृक्शुक्ररक्षणम् ।** ( असंसू. १२. ९३ )
**उपानद्रहितस्य चङ्क्रमणे अनारोग्यमनायुष्यं चक्षुरूपाद्घातादिदोषाः** ( सुचि. २४.७३ )
पायतण. पायांचे रक्षक. पादुका, खडावा. चामड्याच्या पादुका, चपला, वहाणा, बूट इ. पादहिता असेही म्हणतात, गुण–बल, दृष्टि आणि शुक्ररक्षक. पायतणावाचून चालण्याने आरोग्य आयुष्य व डोळे यांना घातक परिणाम होतात.

**उपाय**–पु., **साधनम्** ( अहसू. २९.८० ) इलाज.
**योजनापद्धतिः** ( चसू. २६.१३ )
**'द्रव्याणि यथा कुर्वन्ति स उपायः'** ( सुसू.४१.५ )
**यथा स्वरसकल्कशृतशीतफाण्टघृततैललेहमोदकोत्कारिकादिप्रकारेण यथा कुर्वन्ति** ( सुसू. ४१.५ )
त्या त्या दोषावर रोगावर तत्तन्नाशक द्रव्यादिकांची योजना व योजना पद्धति. द्रव्ये जसे कार्य करितात तो उपाय. द्रव्ये स्वरस, कल्क, काढा, तूप, तेल इत्यादी प्रकारांनी जसे कार्य करतात ते.
**कर्तृकरणकार्ययोनित्रयस्य सौष्ठवमभिधानं** ( चवि. ८.७८ )
कार्याच्या विषयी योग्य अशा उपादान कारण, करण व कर्ता या तिघांची एकसमयावच्छेदे करून कार्य सिद्धीच्या दृष्टीने प्रवृत्ती, उपयोग.
**उपायो नाम भयदर्शन–विस्मापन–विस्मारण–क्षोभण–हर्षण–भर्त्सन–वध–बन्ध–स्वप्न–संवाहनादिः, अमूर्तो भावविशेषः** ( चवि. ८.८७ )
भय दाखविणे, आश्चर्य उत्पन्न करणे, विस्मरण निर्माण करणे, क्षोभ, हर्ष, धिःक्कार, वध, बांधून ठेवणे, निद्रा,अंग चेपणे, चोळणे इत्यादी अमूर्त भावही उपाय होत.
**उपगमनं व्याधिमेलक इत्यर्थः** ( चइ. १.३ )
उपाय म्हणजे उपगमन; जवळ जाणे, रोगांचे जवळ जाणे, रोग एकत्र येणे.
**–बल**–न., **चिकित्साबलम्** ( असंसू. ८.६ )
चिकित्सारूपी बल.
**–वित्**–वि., **उपायज्ञः, यन्त्रशस्त्रावचारणादि यो जानाति सः** ( अहसू. २५.४० )
उपाय जाणणारा. चिकित्सेचे सर्व प्रकार जाणणारा यंत्रानुयंत्रांचा उपयोग जाणणारा.

**उपायार्थ**–वि., **उपायेन अर्थः प्रयोजनम्** ( चवि. ८.७८ )
उपायाचे प्रयोजन. उपायाचा उपयोग.

**उपालम्भ**–पु., **तन्त्रयुक्ति०, उपालम्भो नाम हेतोर्दोषवचनम्** ( चवि. ८.५९ )
एक तंत्रयुक्ति. हेतूचे दोषदर्शन. हेतु हा हेतु नसून हेत्वाभास आहे, खरा नव्हे असे दाखविणे.

**उपावर्तन**–न., **विरामः, परावर्तनम्.** ( सुचि. ६.४ )
थांबविणे, बंद करणे, परत फिरणे.

**उपाश्रय**–पु., **उपधानभेदः** ( चसू. १५.७ ) **अवष्टम्भकम्** ( सुचि. ३७.१०९ ) तक्या, उशी, लोड.

**उपास्त्र**–न., उ( अ )पास्त्रं **शास्त्रनियमवर्जितं धनुः** ( सुचि. ११.११ )
शास्त्रीय नियम न पाळता केलेली अस्त्रे धनुष्य इत्यादी.

**उपोदक**–पु., **वनस्पति०** राजगिरा, थोर मयाळ.

**उपोदका**–स्त्री., **वनस्पति० उपोदिका,**
थोर मयाळ, राजगिरा.

**उपोदकी**–स्त्री., **वनस्पति० उपोदिका**
थोर मयाळ, राजगिरा.

**उपोदिका**–स्त्री., वनस्पति० पत्रशाक० **उपोदिका तिलकल्कसिद्धा हेतुरतीसारस्य** ( चसू. २६.८९ )
**तिलकल्कसिद्धमुपोदिकाशाकं नाश्नीयात्संस्कारविरुद्धत्वात् ।** ( सुसू. २०.१४ )
**गुणाः—मधुरा कषाया स्निग्धा हिमा सरा उष्णवीर्या** ( रा. ७.३४ ) **भेदिनी** ( चसू. २७.९४ ) **वृष्या वातपित्तघ्नी श्लेष्मकरी रुच्या विष्टम्भकारिणी** ( रा. ७.३४ ) **मदविनाशिनी** ( च. सू. २.३३ )
हिं. —पोई.
म. —**थोर मयाळ** ( अहको ). **थोरवेल**
बं. —पुई शाक
त. —पचनैक्कीरे पोतकी
पाले भाजी. तिळाच्या चटणी बरोबर ती शिजवली व खाल्ली तर अतिसार होतो. म्हणून ती खाऊ नये. तिळाचा तिच्यावर संस्कार केल्याने ती विरुद्ध-दोषकारक झाली. **गुण**-गोड, तुरट, स्निग्ध, थंड पण वीर्याने उष्ण, मळाच्या गाठी फोडणारी, सारक, रुचकर, पित्तघ्न, कफकारक. माज नाशक.

**उप्त**–वि., **प्ररोहार्थं भूमौ निक्षिप्तं धान्यम्** ( चशा. ८.१८ ) पेरलेले.

**उभय**–वि., **सर्व०** ( सुचि. ७.३५ )
दोन, दोन्ही; वरच्या व खालच्या अशा दोन्ही मार्गांनी जाणारा. ( रक्त व पित्त )
**–कालम्**–अ., **सायंप्रातरित्यर्थः** ( सुचि. ७.३५ )
दोन्ही वेळा, सायंकाळ व प्रातःकाल.
**–ज्ञ**–वि., **शास्त्रज्ञः कर्मज्ञश्च** ( सुसू. ३.४७ )
शास्त्र व कर्म जाणणारा.
**–भाग**–वि., **ऊर्ध्वाऽधोभागे प्रच्यवमानम्** ( चनि. २.९) वरच्या व खालच्या मार्गाने जाणारे.
**–भागहर**–वि., **वमनं विरेचनं च कोशातक्यादि** ( सुसू.३९.५ )
वरच्या व खालच्या मार्गाने दोषहरण करणारी वांती व रेच करून दोन्ही मार्गांनी दोष काढणारी कडुदोडके, शिकेकई इत्यादी द्रव्ये.
**–वृत्ति**–वि., **उभाभ्यां क्षीरान्नाभ्यां वृत्तिर्यस्य सः, यथा बालः क्षीरपोऽन्नादश्च** ( असंउ. २. पृ. १६ )
दूध व अन्न या दोहोंवर ज्याचा आहार-पोषण-जीवन आहे तो ( बालक ) दूध व अन्नावर रहाणारा बालक.



**–संश्रित**–वि., **अन्तःश्रितः बहिःश्रितश्च यथा विसर्पः** ( चचि. २१.२३ ) त्वचा व अंतर्भाग यांत आश्रित असलेला रोग. जसे धावरे.

**उभयताभाग**–वि., **वमनविरेचनकरम्** ( असंक. ८ त. प्र. पृ. १६६ )
**यथोन्मादचिकित्सिते विषाणिका देवदालिका कारवेल्लिकादि तीक्ष्णमुभयतो दोषहरं द्रव्यं शोधनार्थं देयम्** ( सुउ. ६२.१४ )
वरच्या व खालच्या दोन्ही भागांवर दोषनाशक कार्य करणारे द्रव्य. उन्मादात असे शोधन द्यावे. जसे मेढशिंगी, देवडांगरी इ.

**उभयतोमुख**–वि., **उभयतो मुखं यस्य तत् यथा नाडीयन्त्रं स्रोतोगतशल्योद्धरणार्थं बस्त्युत्तरबस्तिधूमयन्त्रादीनि नाडीयन्त्राणि** ( सुसू. ७.१३ )
दोन्ही बाजूला तोंड असलेले, दुतोंडी नाडीयंत्र. स्रोतसातील शल्य काढण्याला उपयुक्त. बस्तियंत्र, धूमयंत्र इ.

**उभयतःशुद्ध**–वि., **वमनविरेचनाभ्यां शुद्धः** ( सुउ. ३९.१३२ )
वांती व रेच यांनी उभयमार्ग शुद्ध झालेला.

**उभयार्थकर**–वि. **व्याधिहेतुत्वं व्याधिलक्षणं च करोति इति** ( चनि. ८.२० )
स्वतः प्रथम रोग रूपाने-पीडारूपाने आणि मग दुसऱ्या रोगाचे कारण होणारा ज्वर. हा ज्वर या विकाराचे स्वरूप-लक्षण व रक्तपित्त या विकाराचे कारण होतो.

**उभयार्थकारि**–वि., **हेतुव्याधिविपरीतम् यथौषधम्** ( असंसू. १२.९ )
**यत् हेतुव्याधिविपरीतमर्थं करोति यथा छर्द्यां छर्दनम् दैवव्यपाश्रयमौषधञ्च** ( असंसू. १२.९ )
हेतु व व्याधि या दोहोंचा नाश करणारे. हेतुव्याधिविपरीत; कफज वांती असताना वांतीकर औषध दिले तर कफनाश व त्याबरोबरच व्याधिनाश करते. हेतु कफ व वांती हा रोग या दोहोंचा नाश करणारे औषध. मंत्र, होम, बलिदान, मणिबंधन इ. उपाय हे कारणाचा आणि व्याधीचा नाश करतात.

**उमा**–स्त्री., वनस्पति० **अतसी** ( अहसू. ६.२४ ) आळशी.
**–जं तैलम्**–न., **अतसीतैलम्** ( अहसू. ५.६१ )
आळशीचे तेल.
**–पति**–पु., **सिद्धयोग०, मासेन सर्वरोगनाशकः, संवत्सरेण वलीपलितनाशकः** ( र. २७.७१.–७६ )

एक सिद्ध योग. १ महिन्यात सर्वरोगहर व १ वर्षात अंगावरच्या सुरकुत्या नाहींशा करणारा व पिकलेले केस काळे करणारा.

**–प्रसादन**–पु.,ज्वरघ्नयोग०, **शीतज्वरापहः, चातुर्थिकज्वरनाशकः** ( र. १२.५६–५९ )
थंडी वाजून येणारा ज्वर, चौथारे, चौथ्या दिवशी येणारा ज्वर नाहीसा करणारा योग.

**–लेप**–पु., **अतसीलेपः** ( चचि. २९.१४० )
आळशीचा लेप.

**–शम्भु**–पु., सिद्धयोग० **सन्तापशोषबलहीनतातृषाप्रमेहघ्नः वासास्वरसेन युक्तः** ( र. १७.५२–६१
एक औषधीयोग. अडुळशाच्या रसाबरोबर दिल) असतां संताप, क्षय, अशक्तता, प्रमेह, तृष्णा इत्यादी रोगनाशक.

**उम्पास**–पु., वनस्पति०=**व्रीहिः** ( रा. १६.११८ )
तांदूळ.

**उम्पिका**–स्त्री., वनस्पति०=**व्रीहिः** ( रा. १६.११८ )
सुवासिक तांदूळ.

**उरग**–पु., **कृष्णसर्पः, तस्य वसा यष्टीमधुकचूर्णान्विता वातजतिमिरेऽञ्जनार्थं हिता** ( सुउ.१७.३५ )
उराने जाणारा म्हणून उरग. सर्प. काळा सर्प. वातजतिमिर रोगात डोळ्यात अंजन करण्याकरिता याची चरबी ज्येष्ठमधाबरोबर हितकर.
**भूताधिपति०** ( असंउ. ७ पृ. ५९ )
प्राण्यांचा एक अधिपति.
ग्रह० **नागग्रहः, 'पञ्चम्यामपि चोरगा……… विशन्ति'** ( सुउ. ६०.१८ )
एकग्रह. नागग्रह. पंचमी तिथीला पछाडतो.
खनिज धातु०=**सीसकः** ( र. २३.४८ )
एक धातु. शिसे.

**उरण**–पु., **मेषः** ( चसि. ११.२० ) मेंढा.
**जाङ्गलमृग०** ( चसू. २७.४५ )
रुक्ष प्रदेशातील एक प्राणी; मेंढा.

**उरभ्र**–पु., **मेषः** ( सुउ. ५१,५३ ) मेंढा.
**कीट० स वायव्यः वातकोपनः वातरोगान् करोति** ( सुक. ८.५–८ ) एक किडा. वातरोगकर.

**–वसा**–स्त्री., जाङ्गमद्रव्य० **नेत्ररोगेषु अञ्जनार्थं उपयुज्यते** ( असंउ. १६.१२१ )
मेंढ्याची चरबी. डोळ्याच्या रोगात अंजनाकरिता उपयुक्त.

**उरभ्रक**–पु., **उरभ्रः** ( असंउ. ४३. पृ, ३५१ ) मेंढा.

**उरस्**–न., शारीर०, **वक्षः द्वादशाङ्गुलोत्सेधं प्रमाणतः** ( चवि. ८.११७ )
**'अष्टादशाङ्गुलविस्तारमुरः'** ( सुसू. ३५.१२ )
**अवलंबकश्लेष्मणः स्थानम्** ( अहसू. १२.१५ )
**स्तनयोरन्तरालम्** ( सुउ. ६२.३३ )
**श्लेष्मस्थानम्** ( सुसू. २१.७ )
एक शरीरविभाग. छाती; स्वतःच्या अंगुळांनी मोजली तर १२ अंगुळे लांबी व १० अंगुळे रुंदी असलेली आरोग्यदृष्ट्या चांगली. अवलंबक कफाचे स्थान. स्तनांमधील विभाग, कफस्थान.
**ग्रीवामूलादधस्ताद्धृदयोर्ध्वे स्तनयोर्मध्यस्थानमुरः** ( सुसू. १८.१८ )
मानेच्या मुळाच्या खाली हृदयाच्या वर स्तनांच्या मध्ये असलेला अवयव उर होय.
**अस्मिन् चतुर्दशास्थीनि** ( चशा. ७.६ )
**अस्मिन्मर्माणि नव, तानि च एकं हृदयमर्म, स्तनमर्मणी द्वे, स्तनरोहितमर्मणी द्वे, अपलापमर्मणी द्वेऽपस्तम्भमर्मणी द्वे । इति** ( सुशा. ६.५ )
यात चौदा हाडे, नऊ मर्मे आहेत. त्यात हृदय मर्म एक, स्तनरोहित दोन, अपलाप दोन, अपस्तंभ दोन, व स्तनरोहितमर्मे दोन.

**उरःक्षत**–न., उरोरोग०, **उरस्यभ्यन्तरे क्षतादुरःक्षतम्**
**'उरस्यन्तःक्षते सति'** ( इन्दु; असंनि. ३.३३ )
उराच्या आत–फुप्फुसात झालेली जखम.

**सामान्यस्वरूपम्–उरोरुक्कासः श्लेष्मरक्तनिष्ठीवनं च**
**सम्प्राप्तिः–यदा हि पुरुषो दुर्बलोऽपि सन् बलवता-सह विगृह्यात्यतिमात्रं वा भारमुद्वहत्यभिहन्यते वाऽन्यद्वा ।**
**किंचिदेवंविधं विषममतिमात्रं वा व्यायामजातमारभते तदा तस्याऽतिमात्रेण कर्मणोरः क्षण्यते । तस्योरःक्षतमुपप्लवते वायुः । तत्राऽवस्थितो वायुः । श्लेष्माणमुरःस्थमुपसंसृज्य शोषयन् पित्तं च दूषयन्विहरत्यूर्ध्वमधस्तिर्यक्च ।**
सामान्यचिन्हे–उरात वेदना खोकला व कफ आणि रक्ताचे बेडके बाहेर पडणे.
संप्राप्ति–दुर्बलाने बलवानाशी कुस्ती करणे; एकदम फार मोठे ओझे वाहणे व विषम व्यायाम करणे, यामुळे छातीवर ताण पडून छाती–फुप्फुस फाटते. साहसाने वात प्रकुपित होतो व उरस्थानातील कफाशी मिसळून त्याला शुष्क करून पित्ताला दूषित करतो व शरिराच्या निरनिराळ्या भागांत जाऊन विकृति करतो.

तस्य......योंऽशः प्राणवहानि स्रोतांस्यन्वेति तेन श्वासः प्रतिश्यायश्च जायते । ततः क्षणनाच्चैवोरसो विषमगतिमत्त्वाच्च वायोः, कण्ठस्योद्ध्वंसनाच्च कासः सततमस्य संजायते । स कासप्रसङ्गादुरसि क्षते शोणितं ष्ठीवति । शोणिताऽऽगमनाच्चाऽस्य दौर्बल्यमुपजायते । एवमेते साहसप्रभवाः साहसिकमुपद्रवाः स्पृशन्ति ( चनि. ६.४ )

पूर्वरूपम्--एतस्याव्यक्तलक्षणमेव पूर्वरूपम्
( चचि. ११.१२ )

उरोरुक्शोणितच्छर्दिः कासो वैशेषिकः क्षते । क्षीणे सरक्तमूत्रत्वं पार्श्वपृष्ठकटिग्रहः ॥
( चचि. ११.१३ )

त्याचा जो अंश प्राणवहस्रोतसात येतो तो पडसे व श्वास, उत्पन्न करतो छाती ताणली जाऊन व वायु दुष्ट होऊन कंठ विकृत झाल्याने खोकला सतत येतो व त्यामुळे छातींत क्षत होऊन थुंकीतून रक्त येते व दुबळेपणा येतो. **पूर्वरूपे**–त्याची लक्षणे थोड्या स्वरूपात अस्पष्ट होतात तीच पूर्व रूपे होत. छातीत वेदना, रक्ताची वांती, विशेष प्रकारचा खोकला होतो. मात्र क्षीणांमध्ये लघ्वीत रक्त पडणे, फासळ्या पाठ व कंबर जखडणे ही चिन्हे होतात.

**लक्षणम्—उरोभेदनविभजने, पार्श्वपीडनमङ्गवेपनं, क्रमेण वीर्यबलवर्णरुच्यग्निहानिर्ज्वरो व्यथा मनोदैन्यं अग्निवर्धाद्विड्भेदश्च कासमानस्य सुदुर्गन्धो दुष्टः पीतो विग्रथितो बहुः सरक्तोऽसितः श्यावः श्लेष्मा प्रवर्तते । सक्षतः अत्यर्थं क्षीयते शुक्रौजसोः क्षयात् ।** ( चचि. ११.९–११ )

**'सन्तप्तवक्षाः सोऽत्यर्थं दूयनात् परिताम्यति'— मोहं याति** ( सुउ. ४१.२५ )

**विधिः—चरके राजयक्ष्मणि चतुर्विधेषु हेतुषु साहसज एको हेतुः** ( चनि. ६.३ )

**सुश्रुते धातुक्षयहेतुष्वेको रक्तक्षयजः ।**
( सुउ. ४१.२७ )

वाग्भटे पञ्चकासेष्वेकः उरःक्षतजः
( असंनि. ३.३३–३७ )

**लक्षणे**–छातीत फुटल्या सारखी फाटल्यासारखी पीडा होऊन क्रमाने वीर्य, बल, वर्ण, रुचि, अग्नि यांचा नाश होत असतो. अंग कापते. फासळ्यात वेदना, खोकला व त्यातून मृदु, दुर्गंधि, पिवळट, गाठाळलेला, जाडसर, रक्तयुक्त, काळसर, काळा दुष्ट कफ पडतो. मूर्च्छाही येते, छाती सारखी तापलेली असते; शुक्र व ओजःक्षयाने अत्यंत क्षीणता येते; साहसापासून क्षय होतो. साहसधातुक्षय खोकल्याचाच एक प्रकार क्षतज खोकला आहे.

**साध्यासाध्यता–'अल्पलिङ्गस्य दीप्ताग्नेः साध्यो बलवतो नवः । परिसंवत्सरो याप्यः सर्वलिङ्गं तु वर्जयेत् ॥** ( चचि. ११.१४ )

**रोगोऽयं धातुशोषे राजयक्ष्मणि वा पर्यवस्यति, रोगी म्रियते वाऽकस्मात् । 'सानाथ्यात्साध्यः सामर्थ्यात्साध्यः–पाठः** ( असंनि. ३.४२ )

साध्यासाध्यता–बलवान व दीप्ताग्नि असून थोडी व सौम्य चिन्हे असलेल्या रोग्याचा रोग व नवा असलेला साध्य. सर्व तऱ्हेची अनुकूलता असेल तर साध्य. एक वर्षाहून अधिक दिवसांचा हा रोग औषध व पथ्य असेल तोपर्यंत वरा व सर्व लक्षणांचा असाध्य. ह्या रोगात धातुक्षय किंवा राजयक्ष्मा पुढे उद्भवतो. व त्यातच रोगी अकस्मात मरतो.

**चिकित्सासूत्रम्–'साहसं वर्जयेत्कर्म रक्षन् जीवितमात्मनः'** ( चनि. ६.५ )

**'उपद्रवांश्च स्वरवैकृतादीन् जयेद्यथास्वम् ।'**
( सुउ. ४१.२३ )

**कासात् उपेक्षया श्वासक्षयस्वरसादादयो रोगा भवन्ति ततस्तं त्वरया जयेत्तस्याऽऽशुकारित्वात् ।**
( असंनि. ३.४३ )

**चिकित्सा–वृषो लाक्षा तथा नागबलाभ्यासोऽत्रोपयुज्यते** ( असंसू. १३.३ )

**अमृतप्राशः** ( अहृचि. ३.९४–१०१ )

**तथा कूष्माण्डकरसायनमप्यत्रोपयुक्तम् ।**
( अहृचि. ३.११४–११८ )

आपल्या जीवाचे रक्षण करावयाचे दृष्टीने साहसाची कामे वर्ज्य करावीत. **उपद्रव**–स्वर फुटणे इत्यादी उपद्रव योग्य उपचारांनी जिंकावे. खोकल्याची उपेक्षा केली तर श्वास, क्षय, स्वर अशक्त होणे इत्यादी विकार होतात. ते वेगाने प्राणनाश करतात म्हणून त्वरित जिंकावेत. **उपचार**–अडुळसा, लाख तसेच नागबला ( चिकणा ) यांचे सतत सेवन उपयुक्त आहे. अमृतप्राश, कोहोळ्याचे रसायन ही उपयुक्त.

**–क्षतशोष**–पु., शोषभेद० **उरःक्षतनिमित्ताद् धातुक्षयः शोषो वा भवति** ( सुउ. ४१.२६–२७ )
क्षयाचा एक प्रकार, उरःक्षतामुळे धातुक्षय किंवा शरीर सुकणे हा रोग होतो.

**–सुप्तता**–स्त्री., लक्षण० **रक्तजप्रतिश्यायस्य लक्षण०**
( असंउ. २३ पृ. १६७ )

रक्तदुष्टीने होणाऱ्या पडशाचे एक लक्षण. उरःस्थान बधिर झाल्यासारखे वाटणे.

**-स्रोतस्**-न., **सूक्ष्मस्रोतः** ( चचि. २८.१९३ )
उरःस्थानातील स्रोतस् फुप्फुसे व हृदयातील स्रोतस्

**उरस्य**-वि., **उरःसंबद्धम् कर्म** ( सुउ, ४१.२४ )
उराशी संबद्ध. उरात असलेले.

**( उरो )-गल**-न., **कीट० पिपीलिका**
मुंगी. ( असंउ. ३१. त. प्र. पृ, २९९ )
**उलुंगिलपाठः** ( असंउ. ३१ पृ, २३२ )
मुंगीसारखा एक किडा.

**-घात**-पु., **रोग० लक्षण०-'उरःक्षतं गुरु स्तब्धं पूतिपूर्णकफो रसः । सकासः सज्वरो ज्ञेय उरोघातः सपीनसः ॥ 'ताम्राक्षश्च भवेजन्तुरुरोघात-प्रपीडितः'** ( डसुउ. २४.१२ )
एक रोग. यात उरःक्षत, खोकला, ज्वर, पडसे, घाण कफाने भरलेला रस, छाती जड व ताठरलेली, डोळे तांबडे.
**रोग०, लक्षणम्—'पित्तश्लेष्मोत्तरो व्याधिरुरोघातस्त्रिदोषजः । स्वहेतुकुपिता दोषा उरोघातं चतुर्विधम् ॥ कुर्वन्ति सेवमानानां लौल्यमध्यशनादि च । शीतज्वरः प्रतिश्यायः कण्ठः शुकैरिवावृतः** ( काचि. उरोघात पृ. १३२ )
**बाल्ये तस्य लक्षणविशेषः—'निष्टनत्युरसाऽधिकम्'** ( कासू. २५.३८ )
पित्तकफाधिक त्रिदोषज रोग होय. आपापल्या कारणांनी कुपित झालेले दोष ३ व सर्व मिळून १ असा ४ प्रकारच्या उरोघात रोग उत्पन्न करतात. जेवणावर जेवण घेणाऱ्या हावऱ्या मनुष्याला हा होतो. थंडीताप, पडसे, कुसळें भरल्यासारखा गळा असतो. बालकात हा रोग होतो तेव्हां त्याच्या छातीतून दुःखोद्गार आक्रोश बाहेर येतो.

**-धूमायन**-न., **व्याधिलक्षण० उरसो धूमोद्गमनमिव** ( चचि. १८.१५ )
एक रोग लक्षण, छातीतून घशातून धूर निघाल्यासारखे वाटणे.

**-रुज्**-स्त्री., **रोगलक्षण० उरोभवं दुःखम्** ( चचि. ११.१३ )
छातीत होणारी वेदना.

**-रोग**-पु., **उरसि जायमानो रोगः** ( चचि. १.७१ )
छातीचा रोग.

**-विबन्ध**-( परिव० ) पु., **रोगलक्षण० रज्ज्वादिभिर्बद्धमानमिवोरसि दुःखम्** ( हे. अहृसू. ४.८ )
दोरीने बांधल्या सारखी छातीत होणारी वेदना.

**उरु**-वि., **विस्तीर्ण, गम्भीरम्** ( र. २४.९ )
पसरलेले, विस्तृत, मोठे, विस्तीर्ण.

**-पूग**-पु., **वनस्पति० श्वेतैरण्डः, नेत्ररोगे उपयुक्तं द्रव्यम्** ( काखि. १३.३२ )
पांढरा एरंड.

**-माण**-पु., **वनस्पति० औत्तरापथिको फल० वनस्पतिनामा मधुरस्निग्धफलवृक्ष०** ( चचि. २९.६५ )
**गुणाः-गुरूष्णस्निग्धमधुरः बलप्रदो वातघ्नो बृंहणो वृष्यः कफपित्तप्रवर्धनश्च** ( चसू. २७.१५७-१५८ )
**मेध्यः हृद्यः वयस्थापकश्च**
हिं.—नास्पति ( हाराणचंद्र )
म.—वायवर्णा.
**वायवर्णा**-उत्तरेत होणारे एक फळ-गुण-जड, उष्ण, स्निग्ध गोड, बलप्रद, पौष्टिक, शुक्राला हितकर, वातघ्न, कफपित्तवर्धक, बुद्धिवर्धक, हृदयाला हितकर व तारुण्य प्राप्त करून देणारे.

**-मूलक**-वि., **गम्भीरमूलम्** ( र. २४.९ )
ज्याचे मूळ खोल आहे असा.

**स्तम्भा**-स्त्री., **कदली** ( रा. ११.१०७ )
केळीचे झाड.

**उरुबु**-पु.,( सुचि. ३८.४३ ) **उरुबुक**-( चसू. ४.९ ) **उरुबूक**-( सुसू. ४६.२५४; ) **उरुबुक**-( चचि. ३.२६७; ) पु., **उरुबूका**, स्त्री., ( असंसू. ७. १४६ ) **उरुबुकः-एरण्डः** ( चसू. ४.९ ) **उरुबूक= शुक्लैरण्डः** ( सुसू. ४६.२५४; ) **रक्तैरण्डः,** ( चचि. ३.२६७ ) ( रा. ८.४४६ ) **शाक० तल्लघु भिन्नशकृत्तिक्तं च** ( चसू. २७.१०८ ) **उरुबूक-तैलम्-एरण्डतैलम्** ( असंचि. १७. त.प्र.पृ. ९८ )
एरंडाचे तेल.
एरंड, पांढरा एरंड, तांबडा एरंड. एक भाजी; ती लघु, कडु आहे; गाठीयुक्त मल फोडते.

**-पत्र**-न., **एरण्डपत्रम्** ( अहृसू. २४.१८ )
एरंडाचे पान.

**मूल**-न., **एरण्डमूलम्** ( सुउ. ५१.४९ ) एरंडाचे मूळ.

**उरुबूक**-पु., **वनस्पति० रक्तैरण्डः=एरण्ड** ( रा. ८.४४६ ) एरंड, लाल एरंड.

**उर्वरी**-स्त्री., **वनस्पती०=व्रीहिः** ( रा. १६.९८ )
तांदुळाचा एक प्रकार.

**उर्वारु**-न., **वनस्पति०=एर्वारुकम्** ( ध. १.१७६ )
काकडी, खिरा.

**–तैल**–परिव० न., एर्वारुतैलम् ( ध. ६.१४२ )
काकडीच्या बीचे तेल.

**उर्वी**–स्त्री., **भूमिः** ( सुसू. ६.८ )
**पृथिवी** ( सुशा.१.४ ) पृथ्वी, धरणी, जमीन, माती.
न., **मर्म० सक्थिमर्म० उरुमध्ये वैकल्यकरं सिरा-मर्म, 'सिरामर्मैदमेकाङ्गुलं वैकल्यकरञ्च,' संख्या–वामदक्षिणभेदेन द्वे, तद्व्यधेन शोणितक्षयात् सक्थिशोषः** ( सुशा. ६.६ )
मांडीतील एक मर्म. हे शिरामर्म डावीकडे उजवीकडे एक एक आहे यावर आघात झाल्यावर रक्तक्षयामुळे मांडी सुकते. म्हणून याला वैकल्यकर मर्म हे नांव आहे.

**उलका**–चुल्का पाठः स्त्री० **गेहे जातो राग० "पतङ्गी-कल्कतो जाता लोहे तारे च हेमता। दिनानि कति-चित् स्थित्वा यात्यसौ उलका ( चुल्का ) मता ॥"** ( र. ८.५१–५२ )
लोखंड किंवा रुपे यावर औषधीकल्काचा लेप केल्याने त्यावर सोन्याचा रंग निर्माण झाला की त्याला पतंगी आणि कांही दिवसांनी तो गेला की, त्याला उलका ( चुल्का ) म्हणतात.

**उलुङ्गिल**–न., **कीट०, पिपीलिका** ( असंउ. ३१ पृ. २३२ )
एक प्रकारची मुंगी.

**उलुम्ब**–पु., **होलकाः, मुद्गकलायादिशिम्बा अग्निपक्वा होलका इत्युच्यन्ते ।**
**गुणाः**––लघवः कफमेदोविशोषणाः ( सुसू. ४६.४१० )
मूग, वाटाणा, इत्यादींच्या भाजलेल्या शेंगा, लोंबी, उळा हुरडा या हलक्या व कफ व मेद सुकविणाऱ्या आहेत.
**–क**–पु., **सरसाः,–सार्द्राः–भृष्टयवाः** ( सुचि. १०.५ )
ओले रसरसीत भाजलेले.जव.

**उलूक**–पु., **पक्षि० प्रसहवर्गीयः** ( चसू. २७.३६ ) ( सुसू. ४६.७४; ) **दिवाभीतः** ( सुउ. ६०.३८ ) **घूकः** ( काखिबालग्रह ) **अस्य मांसं यक्ष्मिणे प्रशस्तम्, छद्मना देयम्** ( सुउ. ४१.३६ ) **चर्म-रोमाणि ग्रहचिकित्सायां धूमार्थमुपयुज्यन्ते ।** ( सुउ. ६०.३८ )
**मूत्रपित्तशकृल्लोमनखचर्माणि वातश्लेष्मात्मके उन्मादे सेकाञ्जनप्रधमननस्यधूमेषूपयुज्यन्ते** ( चचि. ९.७४.७५ )
**उलूकमांसगुणाः पित्तलम्, भ्रांतिकरणम्, वातलम्, शोषणम्** ( ध. ६.४७४ )
एक पक्षी. घुबड. क्षयरोगावर याचे मांस उपयुक्त. गुपचूप द्यावे. उन्मादावर याचे मूत्र, पित्त, विष्ठा, केस, नखे व कांतडे ही शेक, अंजन, नस्य, धुरी देण्यास उपयुक्त. ग्रहबाधेवर कातडे केस धुरी करिता. **मांसगुण**–पित्तवातवर्धक, शोषक, भ्रांति करणारे.
**–मुख**–न., **स्वस्तिकयन्त्र०, उलूकमुखसदृशं यन्त्रम्** ( सुसू. ७.१० )
स्वस्तिक यंत्राचा प्रकार. घुबडाच्या तोंडासारख्या तोंडाचे यंत्र.

**उलूखल**–न.,**उदूखलम्** ( चशा. ७.६ )
**तण्डुलकण्डनोपयोगि साधनम्** ( सुशा. ५.२७ )
उखळ, उखळी, तांदूळ कांडण्याचे उखळ.
**–संधि**–पु., **अस्थिसंधिप्रकार०, उलूखलाकृतिः संधिः, 'संधयः......... कक्षावङ्क्षणदशने-षूलूखलाः'** ( सुशा. ५.२७ )
**कक्षासंधी द्वौ, वङ्क्षणसन्धी द्वौ, दशनसंधयो द्वात्रिंशदित्येते उलूखलसंधयः** ( सुशा. ५.२७; ) ( असंशा. ५.७७ )
उखळासारखे सांधे. काख, जांघ, दांत यांचे सांधे. काखेतले दोन, जांघेतले दोन, व दांताचे बत्तीस.

**उलूप**–तृण०, ( चवि. ३.७. ( ३ ) गवताचा प्रकार.

**उल्का**–स्त्री., **आकाशात् पतन् तेजःपिण्डः** ( सुसू. ३२.४ )
आकाशातून पडणारा तेजस्वी गोळा.
**–पात**–पु., **तारकापातः, आकाशाज्ज्वलदग्निगोल-पातः, उत्पातेष्वेकः** ( सुचि. २४.९२; चवि. ३.७ ( ३ )
आकाशातून जळते गोळे पडणे. तारा तुटणे.

**उल्व**–न., **गर्भकोशः, जरायुः** ( असंउ. १. ( पृ. १ )
गर्भाची पिशवी.
**जातमात्रस्य बालस्य त्वगुपरि दृश्यमानः गर्भकाले संचितः चिक्कणद्रव्यविशेषः, उल्बदोषः, जात-मात्रमेव बालमुल्बात्सैन्धवसर्पिषा मार्जयेत् ।** ( असंउ. १ )
जन्मलेल्या बालकाच्या अंगावर दिसणारे गर्भावस्थेत साचलेले चिक्कण द्रव्य. गर्भ पिशवीतून बाहेर येतांच बालकाला सैंधव आणि तूप लावून स्वच्छ करावे.

**उल्बक**–पु., **रोग० जातमात्रबालस्य रोगः, लक्षणम्–गर्भाम्भसोऽवमनात् कण्ठगतस्य श्लेष्मणः संपर्काद्वा दुष्टो रसो हृदये मार्गानावृणोति । तत आवृत-**

**मार्गत्वाद्बद्धमुष्टिः बालो हृद्रोगाक्षेपकश्वास-कासच्छर्दिज्वरादिभिरभिभूयते । सहजोऽम्बुपूर्णश्च तस्यापरपर्यायौ** ( असंउ. २ ( पृ. ३२ )

नुकत्याच जन्मलेल्या बालकाचा एक रोग. **कारण**- गर्भोदक किंवा घशातील कफ बाहेर न काढल्यामुळे होतो. किंवा कफाच्या बाधेने होतो.

**चिन्हे**—आचके, श्वास, खोकला, मार्गरोधामुळे मुठी आवळलेल्या, ओकारी, ज्वर, हृद्रोग इत्यादी. याला सहज किंवा अंबुपूर्ण असेही म्हणतात.

**उल्बण**–वि., **विपुलम्, बहुलम्** ( सुचि. ३४.५ )
अधिक; पुष्कळ वाढलेला; प्रकुपित.

**–मारुत**–वि., **बहुवातः** ( अहृसू. १९.३४ )
प्रकुपित वाताचा, वाताधिक्य युक्त.

**उल्मुक**–न., **अङ्गारः** ( चसू. १७.९८ )
निखारा, विस्तव, पेटलेला कोळसा.

**उल्लापक**–पु., **मिथो भाषणम्** ( असंसू. २१ )
दुःख किंवा रोग यांनी शब्दात झालेला बदल— गुप्तभाषण, निंदा.

–न., **स्तोत्रम्** ( चशा. ४.३७ ( ७ )
( चसू. १५.७ ) स्तोत्र. स्तुतिपर श्लोक.

**उल्ली**–पु., **वनस्पति०=पलाण्डुः** ( रा.७.१०० ) कांदा.

**उल्लुप्त**–वि., **पिष्टमिव कृतम्, शूल्य०, परिशुष्कमांसं निरंतरं छेदनातिशयेनाणुशश्छिन्नत्वात्पिष्टमिव उल्लुप्तपिष्टम्; उल्लुप्तमिति पाचका वदन्ति ।**
( सुसू. ४६.३५५ )
सुकलेल्या मांसाचे वरचेवर बारीक बारीक तुकडे केल्याने शेवटी ते पिठासारखे बारीक होते अशा वेळी त्याला दिलेले नाव.

**बस्तिप्रणेतृदोष०, उल्लुप्तमिह बस्तिपीडनदोषः, यः पीडनविच्छेदं कृत्वा पीडयते सः, तदेवोल्लुप्तत्वमिति, चक्र०** ( चसि. ५.८ )
बस्ति देणाऱ्याचा दोष. बस्ति एकदम न दावता थांबून थांबून दावणे.

**न्न**–पु., **वमनम्** ( चचि. २८.१९६ )
**आहारस्य च्छर्दनम्, तच्छोषपूर्वरूपम्**
( चनि. ६.१५ )
वांती. आहार उलटून पडणे. क्षयाचे पूर्वरूप.

**उल्लेखन**–न., **वमनम्** ( चचि. २४.४४ ) उलटी; वांती.

**उल्लोडित**–न., **दधिसरः** ( चसू. १३.६६ )
घुसळलेले दही. दह्यावरील साय. मलई.

**उशीर**–पु.न; तृण० **तस्य सुगन्धिमूलमुपयुक्तम्**
( सुसू. ३८,२४ )
**पित्तसंशमनवर्गे एकं द्रव्यम्** ( सुसू. ३९.८ )
( अहृसू. १३.६ ) **तिक्तस्कन्धे एकं द्रव्यम्** ( अहृसू. १०.२८ ) **दाहत्वग्दोषस्वेदापनयनप्रलेपनानां श्रेष्ठम्** ( चसू. २५.४० असंसू. १३.३ ) **शुक्रशोधनगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१२ ( २० ) ( असंसू. १५.२५ ) **वर्ण्यगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१० ( ८ ) ( असंसू. १५ ) **दाहप्रशमनगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१७ ( ४१ ) ( असंसू. १५.४० ) **अङ्गमर्दप्रशमनगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१७ ( ४४ ) **धूम्रपाने उपयुक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ५.२१ ) **सारिवादिगणे एकं द्रव्यम्,** ( असंसू. १६.५ ) **छर्दिनिग्रहणगणे एकं द्रव्यं** ( चसू. ४.१४ ( २८ ) **गुणाः–तिक्तो मधुरानुरसः शीतो लघुः स्वेदघ्नो वातपित्तघ्नो दाहक्लान्तिज्वर-तृष्णाप्रमेहरक्तविकारदौर्गन्ध्यश्रमहरः** ( ध. ३.१४ ) **'उशीरं पाचनं ज्वरातिसारवमथुरक्तपित्तक्षतापहम्'** ( असंसू. १२.७८-७९ )
हिं.—खस, काला वाला.
म.—काळा वाळा.
गु.—काळो वाळो.
बं.—खश.
त.—वेहि वेर.
एक सुगंधी मूळ. प्रथम कडु मागाहून मधुररस, कंडू, दाह, त्वग्दोष, घाम कमी करणे, शुक्रशुद्धिकर, वर्ण चांगला करणारा, थंड, अंग दुखणे, ओकारी कमी करणे, थकवा, दुर्गंधी, तहान, प्रमेह, ज्वर नाशक लघु, पित्तशामकवर्ग, कडुवर्ग, शुक्रशोधक, व वर्ण चांगला करणारा वर्ग, दाहनाशक, त्वग्दोषनाशक अंगदुखी कमी करणारा, वांतीनाशक गण, अनंतमूळादि वर्ग ह्या सर्व वर्गांत वाळा आहे. घाम कमी करण्याला लेप करावा. धूम्रपानाला उपयुक्त. वात पित्तनाशक ग्लानी नाशक, पाचक, रक्तपित्त व उरःक्षतनाशक आहे.

**उशीरादितैल**–न., **सिद्धतैल०, उशीरलोध्रत्रिफलाप्रियङ्गुभिर्द्रव्यैः सिद्धं तिलतैलं कफजतिमिरे नस्यार्थमुपयोज्यम्** ( सुउ. १७.४१ )
काळा वाळा, लोध्र, त्रिफळा इत्यादी घालून तयार केलेले तेल. कफापासून झालेला तिमिर नामक दृष्टिदोष असताना नाकात घालण्यासाठीउपयुक्त.

**उषण**–पु., **रस०, कटुरसः** ( असंसू. १.३५ )
एक रस. तिखट रस.

**उषणा**–स्त्री., **पिप्पली** ( रा. ६.११० ) पिंपळी.

**उषर**–वि., **लवणयुक्तम्** ( चक. १.९ ) खारी जमीन.

**उषा**–स्त्री., **रोगलक्षण० दाहः** ( सुचि. २.२२–२३ )
**अरतिमान् दाहः** ( अहृसू. २९.४ )
दाह. बेचैन करणारा दाह. अंगाची आग.

**उषित**–वि., **स्थितम्** ( सुचि. ४.२९ )
**रात्रौ स्थितम्** ( सुउ. ४१.३८ )
**पर्युषितम्** ( अहृसू. ७.३६ )
ठेवलेले, शिळे, रात्रीचा ठेवलेला, शिजविलेला.

**उष्ट्र**–पु.,–पशु० **उष्ट्रिका** ( र. १०.७९ ) उष्ट्री, स्त्री., ( चसू. १.९४ ) **ग्राम्यवर्गीयः** ( सुसू. ४६.८५ ) **वातप्रकृतिः पशुः** ( सुशा. ४.६७ ) **मरुभूमौ वर्तमानः** ( सुचि. ७.१८–१९ )
उंट, वरड प्रदेशात असणारा वात प्रकृतीचा गावठी पशु. उंटीण, सांडणी.
'( **उष्ट्री** ) **क्षीरमुदरश्वयथुघ्नानां श्रेष्ठम्**' ( असंसू. १३.३ ) '**अल्पाहारतया......उष्ट्रीणां** ( **पयः** ) **......अलवणम्** ( काखि. २२–पृ. ३५६ )
**श्वयथुरोगे मासं सप्ताहं वा भोजनवारिवर्जनपूर्वं योजनात्तद्रोगहरम्** ( चचि. १२.२६ ) **दुग्धगुणाः**– **स्वादु** ( सु ) **ईषल्लवणमुष्णं, रूक्षं, लघु, दीपनं,** ( अहृसू. ) **वातकफघ्नं आनाहकृमिशोफोदरकुष्ठ-गुल्मश्वासहरम्, विषघ्नं** ( सु. चसू. २७.२२० ) **दुर्बलाय प्राणभृत्** ( चचि. १३.१८३; सुसू. ४५.५३ ) ( असंचि. १७ त. प्र. पृ. ९५ ) ( अहृसू. ५.२५ ) ( ध. ६.१७१ ) **बहुत्वाच्च घनत्वाच्च बल्यं पुष्टिकरं पयः । गुरु वृष्यं च निर्दिष्टं मधुरं च विशेषतः ॥** ( काखि. २२. पृष्ठ ३५६ ) **दधिगुणाः–स्वाद्वम्लमीषत्क्षारं गुरु** ( **सु** ) **कटु विपाके भेदि** ( **सु** ) **वातघ्नं अर्शकुष्ठकृम्युदरशूलघ्नं च** ( सुसू. ४५.७० ध. ६.१९४ )

उंटिणीचे दूध उदररोगातील सूज नाहीशी करणाऱ्यांमध्ये श्रेष्ठ. वात कफनाशक, दुर्बलांना उत्तम, पौष्टिक; मधुर, मूळव्याध, कुष्ठ, कृमि, उदर, गुल्म, श्वास, विष, शूळनाशक. रुक्ष, हलके, दीपक, जड, शुक्रवर्धक. पचनानंतर तिखट. उंटीण थोडा आहार घेते म्हणून तिचे दूध थोडे खारट असते; सुजेत अन्नपाणी न घेता जरुरीप्रमाणे सात दिवस, महिनाभर हे दूध सेवन केल्याने ती सूज नाहीशी होते. हृद्रोगनाशक. याचे दही–मधुर, अम्ल, किंचित् लवण, पचनास जड, पचल्यानंतर तिखट, मलभेदक, वात, मूळव्याध, कुष्ठ, कृमि, उदर आणि शूलनाशक आहे.

**नवनीतगुणाः– लघुविपाकं शीतलं व्रणकृमिकफास्रववातघ्नं विषनाशनम्** ( रापरि. १५.११ )
लोणी. विषनाशक व वातघ्न, थंड, पचनानंतर हलके व्रण, कृमि, कफजरक्तपित्त नाशक, वात व विषनाशक.

**घृतगुणाः–मधुरशीतकटुविपाकि दीपनं कफवातघ्नं शोफकृमिविषकुष्ठगुल्मोदरमूर्च्छाप्रमेहोन्मादगर-ज्वरापस्मारहरम्** ( सुसू. ४५.१००; ध. ६.१५० )
**मांसगुणाः–शोषिणे हितम्** ( सुउ. ४१.३७ )
**स्वादूष्णं शीतं** ( **रा** ) **लघुपाकि चक्षुष्यं बल्यं पुष्टिकरं रुच्यं वीर्यकरम् त्रिदोषघ्नमर्शोमेदहरम्** ( ध. ६.३८० )

तूप उन्माद, अपस्मार, गुल्म, विष इ० नाशक. मधुर, थंड, पचनानंतर तिखट, दीपक, कफवात-नाशक, सूज, कृमि, कुष्ठ, उदर, मूर्च्छा, प्रमेह, ज्वर, मेद, त्रिदोष व मूळव्याधनाशक आहे.
मांस–लघु, क्षयाला व डोळ्यांना चांगले, वल, पुष्टिकर, त्रिदोषघ्न, गोड, उष्ण, रुचकर, शुक्रकर पचनानंतर हलके.

**मूत्रगुणाः–सतिक्तं श्वासकासघ्नमर्शोघ्नं चौष्ट्रमुच्यते ।** ( चसू. १.१०३ )
**गजोष्ट्रादीनां पुंसां मूत्रं ग्राह्यम्** ( हे. अहृसू. ५.८२–८३ )
**तत्कटुतिक्तलवणोष्णं बल्यं पित्तलं वातघ्नं शोफ-कुष्ठोदरोन्मादकृम्यर्शोघ्नम्** ( सुसू. ४५.२२८ ) ( ध. ६.४५५ )

**मूत्रगुण**––थोडे कडु, श्वास. खोकला, मूळव्याध नाशक. हत्ती, उंट वगैरे प्राण्यात मूत्र नर प्राण्याचे घ्यावे. ते तिखट, कडु, लवण, उष्ण, बलकर, पित्तकर, वातनाशक, सूज, कुष्ठ, उदर, उन्माद, कृमि, मूळव्याधनाशक असते.

**पुरीषगुणाः–शुष्कपुरीषचूर्णाऽवचारितमन्नं प्रमेहे उपयुज्यते** ( सुचि. ११.११ )
पुरीषगुण–उंटाचे वाळलेले शेण भोजनात मिश्र करुन प्रमेहात वापरणे श्रेयस्कर.

**तस्य दन्तोपयोगः–दन्तः एडगजादियोगे कुष्ठप्रशमनार्थम्** ( चचि. ७.१६० )

**क्षतशुक्रहरवर्त्युपयोगी च** ( असंउ. १४. पृ. १०४ ) **शकृदादिसिद्धघृतं शोषे उपयुक्तम्, तच्च उष्ट्र्याः शकृद्रसक्षीरमांसरसरुधिरैः द्राक्षाश्वगन्धामगधासिताभिः सिद्धम्** ( सुउ. ४१.४९ )

**उष्ट्रास्थिक्षारः** पु० क्षार०, **हस्तिमेहे पानार्थमुपयुज्यते** ( सुचि. २१.९ )

तरोटा इत्यादी औषधामध्ये कुष्टनाशक म्हणून दांत उपयुक्त. डोळ्याचा व्रण नाशक म्हणून दांताची वात उपयोगी. उंटाची लेंडी मूत्र इत्यादीने सिद्ध तूप क्षयावर उपयुक्त, त्यात दूध, मांसरस, रक्त, द्राक्षे, आस्कंद, पिंपळी, खडीसाखर ही घालावी.

हाडांचा चुना हस्तिमेहावर पिण्यासाठी उपयुक्त.

**–काण्डी**–स्त्री., वनस्पति० **एतस्याः बीजं मधुरं वृष्यं सन्तर्पणं च, गुणाः–तिक्ता उष्णा रुच्या हृद्रोगघ्नी च** ( रापरि. १०.४३ )

उत्कटारी. बी पौष्टिक. मधुर, तृप्तिकर, असून ही कडु, उष्ण, रुचकर आहे. व सर्वांगचूर्ण हृद्रोगघ्न.

**–ग्रीव**–पु., भगन्दररोग० ( सुनि. ४.६ )

एक भगंदर रोग.

**–धूमक**–पु., वृश्चिक० **उष्ट्रवद्धूमवर्णत्वात् उष्ट्रधूमको, रात्रिचारो वा, दंशलक्षणम्–दंशेनाऽङ्गानां शीताम्बुना सेक इव, शेफस्तम्भः हृष्टरोमता च, सः साध्यः** ( असंउ. ४३ पृ. ३५४–५५ )

एक प्रकारचा विंचू. उंटासारखा काळसर, पिंगट वर्णाचा, थंड पाणी शिंपडले जाते असा त्रास, जननेंद्रिय ताठ व रोमांच ही लक्षणे दंशाने होतात. साध्य.

**–भक्षिका**–स्त्री., वनस्पति० **दुरालम्भाभेदः धन्वयासः** ( रा. ३.२२ ) धमासा.

**–रथ**–पु., **उष्ट्रेण युक्तो रथः** ( सुसू. २९.६ )

उंटगाडी. उंट जुंपलेली गाडी.

**ष्ट्रिका**–स्त्री., **वृश्चिकाली** ( रापरि. ९.७ ) विंचवी.

**ग**–पु., गुण० **विंशतिगुणेष्वेकः शीतविपरीतगुणः स्वेदने शक्तिः** ( अहसू. १.१८ ) **वीर्यसंज्ञको गुणः, अग्निगुणभूयिष्ठः** ( सुसू. ४१.११ ) **अस्य कर्म–क्लेशकरं, भेदनं, पाचनं, मूर्च्छातृट्स्वेददाहकरम्** ( सुसू. ४६.५१४ ) **वातघ्नः** ( सुसू. ४१. ११ ) **त्वगिन्द्रियग्राह्यस्पर्शः** ( चशा. ६.१० )

वीस गुणांपैकी एक. अग्निगुण. पचविणे, फोडणे, घाम आणणे, दाह.

तहान, मूर्च्छा उत्पन्न करतो. वातनाशक आहे. त्वचेने समजणारा गुण.

**घर्मः, आतपः** ( सुसू. ३०.२१ ) ऊन. उन्ह.

वि., **अग्निगुणभूयिष्ठम्, यथा उष्णवीर्यद्रव्यम्** ( चक. १.५ ) अग्निगुणाधिक. वीर्याने उष्ण.

**–कामत्व**–न., **रोगलक्षण० उष्णाभिलाषः** ( अहसू. ११.६ ) पहा ' उष्णकामिता '

**–कामिता**–स्त्री., **रोगलक्षण० उष्णाभिलाषः** ( सुसू. १५.१५ )

रोगाचे एक लक्षण० गरम–उष्ण हवे अशी इच्छा. वात व कफ रोगांचे लक्षण.

**–काल**–पु., **ग्रीष्मकालः, वसन्तग्रीष्मात्मकश्चातुर्मासिकः** ( चसू. ११.४२ )

उन्हाळा. ग्रीष्मऋतू. वसंत व ग्रीष्म अशा दोन ऋतूंचे चार महिने.

**–गण**–पु., **उष्णवीर्यौषधसंग्रहः, वातरोगे सेकलेपक्वाथेषूपयुज्यते।** ( सुचि. १७.४ )

वीर्याने उष्ण असणाऱ्या औषधींचा गट. वात रोगात शेक, लेप व काढ्याच्या उपयोगी.

**–गर्भगृह**–न., **गृहमध्यगतमुष्णस्वभावं गृहम्** ( चसू. १४.२८ )

ज्या घराचा आतील भाग उष्ण साधनांनी गरम ठेवला आहे ते.

घराच्या आतील भागातील जेथे उष्णता असते, असा भाग.

**–जल**–न., ( **उष्णाम्बु** ) **क्वथितं जलम्** ( चचि. १३.१६१ सुसू. ४६.४२० )

ऊन पाणी. उकळलेले पाणी. पहा ' उष्णाम्बु '

**–तोय**–न., **अनुपान० उष्णजलम्** ( सुसू. ४६.४२० ) पहा ' उष्णाम्बु '

**–दाह**–पु., लक्षण० **उष्णेन कृतो दाहः उष्णेन कालेन उष्णेनाहारादिना च दाहः** ( इंदु. असंसू. ६ )

उष्ण द्रव्याने झालेला दाह. उष्णकाल, आहारादिकांनी होणारा दाह.

**–दोष**–पु., **उष्णकालसमुद्भवो दोषो रोगो वा** ( असंसू. ९ )

उष्णकालाने उद्भवलेला रोग. उष्णाधिक्याने झालेला दोष किंवा रोग.

**–निःश्वास**–पु., लक्षण० **उष्णस्पर्शः उच्छ्वासः** ( चचि. २३.१६८ )

स्पर्शाला उष्ण लागणारा बाहेर निघणारा श्वास. विकाराचे एक लक्षण.

**-फला**-स्त्री., वनस्पति० बिम्बीभेदः, मधुरबिम्बी= बिम्बी ( रा. ७.३०४ )
एक वनस्पती-तोंडले.

**-वात**-पु., उष्णस्पर्शो वायुः, स ग्रैष्मिकः शारदो वा, 'उष्णवातातपैर्दग्धे शीतः कार्यो विधिः सदा' ( सुसू. १२.३८ )
उष्णस्पर्शी वायु. ग्रीष्म व शरद् ऋतूतील वारा; झळ. उष्णवात व ऊन्ह यांनी त्रास झाल्यास नेहमी थंड उपचार.

मूत्ररोग० त्रयोदशबस्तिविकारेष्वेकः ( चचि. ९.३८ ) मूत्राघात० ( सुउ. ५८.२३ ) संप्राप्ति- व्यायाम-अध्व-आतपैर्वातावृतं पित्तं कृच्छ्रादधः स्रावयेत् । लक्षणम्-बस्तिमेढ्रगुदं च प्रदहन् हारिद्रवर्णं रक्तं सरक्तं वा मूत्रमधः स्रवति । ( सुउ. ५८.२२ )

चिकित्सासूत्रम्-मूत्रदोषे पञ्चकर्मक्रमो हितः । ततः संशुद्धदेहानां हिताश्चोत्तरबस्तयः । ( सुउ. ५८. ४९-५० )

चिकित्सा-शृतशीतपयोऽन्नाशी चन्दनं तण्डुलाम्बुना । पिबेत् सशर्करं श्रेष्ठमुष्णवाते सशोणिते ॥ ( भाप्र. मूत्राघात चि; असंनि. ९.२८, अहनि. ९.३५.३६ )

तेरा बस्तिरोगांपैकी एक; अधिक व्यायाम, प्रवास, ऊन्ह यांनी वात वाढून पित्ताला आवृत करून मूत्रात आणतो तेव्हा लघ्वीला कळ लागते. लिंग, बस्ति, गुद, यांची आग; पिवळट, लाल किंवा रक्तयुक्त लघ्वी होते. त्यावर पंचकर्मपूर्वक देहशुद्धी उत्तर-वस्तीसह करावी व तापवून थंड केलेल्या दुधाशी जेवण. तांदुळाच्या धुवणात साखर व चंदन घालून घेणे. तापवून थंड पाणी पिणे. हा रक्तयुक्त उष्ण-वातात श्रेष्ठ उपचार आहे.

**-वायु**-पु., दुष्टवात, उष्णस्पर्शः बाह्यो वायुः ( चवि. ३.७ ( १ ); असंसू. ९. ९६ )
दुष्ट वात. गरम वारा.

**-विधि**-पु., क्रिया० यथा स्वेदः ( सुउ. ३९.२६६ )
उष्णकर्म. जसे वाफारा देणे. घाम काढणे.

**-वीर्य**-न., वीर्य० आग्नेयम्, स्वेदने शक्तिः ( अहसू. ९.१८-१९ )
एक प्रकारचे वीर्य. अग्निगुणी वीर्य. पचनसमर्थ. घाम काढणारे.



**-शरीर**-वि., रोगलक्षण० तप्ताङ्गः ज्वरार्तः ( चचि. ३०.२४४ )
अंग तापलेला. ज्वरी. अंगात ताप असलेला.

**-स्वभाव**-वि., स्वभावतः उष्णम् ( अहसू. ३.१४)
मूळचे उष्ण. उष्ण प्रकृतीचा.

**उष्णाभिप्रायता**-स्त्री., लक्षण०, उष्णप्रियता ( चनि. १.२१ चनि. १.२७ )
गरम आवडणे. उष्णेच्छा हे एक लक्षण.

**उष्णाभिप्रायिन्**-वि., उष्णस्य अभिप्रायः-इच्छा अस्यास्तीति ( चचि. ३.२६७ )
उष्णेच्छु. गरम पदार्थांची इच्छा असलेला.

**उष्णाभिभूत**-वि., उष्णजन्यव्याधिग्रस्तः ( चसि. १.३५ )
उष्णतेने पीडलेला. उष्ण व्याधीने ग्रासलेला.

**उष्णाम्बु**-न., उष्णं जलम्, कफविच्छेदि पित्तवातानुलोमनम्, स्रोतोमार्दवकरम् । ( सुउ. ३९.१०६-१०७ )

दीपनं पाचनं कण्ठ्यं लघूष्णं बस्तिशोधनम् । हिध्माऽध्मानानिलश्लेष्मसद्यःशुद्धौ नवज्वरे । कासामपीनसश्वासपार्श्वरुक्षु च शस्यते ॥ ( असंचि. १ तप्र. १. ) ( अहसू. ५.१६.१७ )
ऊन पाणी. कफाचा फडशा पाडणारे. पित्त व वात आपल्या मार्गाने बाहेर घालवणारे. स्रोतसे मृदु करणारे, अग्निदीपन, अन्नपाचन, लघु, उष्ण, घशाला हितकर, मूत्राशय शुद्ध करणारे. उचकी, पोटफुगी, नवज्वर यांवर; वांती व रेचक घेतले त्या दिवशी; आम, खोकला, पडसे, श्वास, फासळ्यात वेदना यात उपयुक्त. वातकफनाशक.

**उष्णाम्बुतप्त**-वि., उष्णोदकेन उष्णीकृतम् ( अहसू. २०.१९ ) ऊन पाण्यात गरम केलेले.

**उष्णाम्बुपरिषेक**-पु., उष्णाम्बुस्नानम्, "उष्णाम्बुनाऽधःकायस्य परिषेको बलावहः । तेनैव चोत्तमाङ्गस्य बलहृत्केशचक्षुषाम् ॥ ( अहसू. २.१७ )
ऊन पाण्याचे स्नान. ऊन पाणी डोक्यावरून घेऊ नये. केस व डोळे यांना बाधक; खांद्यावरून ऊन पाणी घेणे बलवर्धक.

**उष्णार्त**-वि., रोगलक्षण० घर्मपीडितः (सुसू. ४५.१४४)
ऊन्ह किंवा उष्णता यांनी पीडलेला.

**उष्णाश्रुपात**-पु., रोगलक्षण०, ( सुउ. ५.७ )
रोगाचे एक लक्षण. गरम अश्रू डोळयातून गळणे.

**उष्णीष**-पु., न., शिरोवेष्टनम्, शिरस्त्राणम् ( सुक. १.१५ ) केशबन्धपट्टकः ( असंसू. ८ )

**गुणाः—पवित्रं केश्यमुष्णीषं रजोवाताऽऽतपापहम्।** ( सुचि. २४.७५ )
डोक्याला बांधलेले पागोटे, पगडी, फेटा, पट्टा, टोपी. धूळ, वारा, उन्ह यांची बाधा होऊ देत नाही. केसांस हितकर व शुभ.
**शलाकायाः उष्णीषम्—शलाकायाः कार्पासवेष्टिताग्रम्, तत्प्रमार्जनक्रियासूपयुक्तम्** (सुसू. ७.१४)
सळईच्या टोकास गुंडाळलेला कापूस. तो नाक, कान, यांतील दोष काढून ते स्वच्छ करण्यास उपयुक्त.

**उष्णोपचार**—पु., **उष्णाऽऽहारादिः** ( अहृसू. ५.६६ )
उष्ण अन्नपान इत्यादी.

**उष्णौषध**—न., **अग्निगुणभूयिष्ठं द्रव्यम्** ( चक. १.५ )
उष्ण गुणाचे औषध. गरम औषध.

**उष्मन्**—पु., **औष्ण्यम्** ( अहृसू. ११.२ ) उष्णता, गरमी.
**बाष्पम्** ( चशा. ८.१९ असंसू. ८ ) बाष्प; वाफ.
**अग्निः** ( अहृसू. १३.२५ )
**जठराग्निः** ( चचि. १५.२१५ )
**भूताग्निः** ( चचि. १५.१३ )
उदरातील पाचकाग्नि. महाभूतांचा अग्नि.

**—दाह**—पु., **उष्णेन कालेनोष्णेनाहारादिना च दाहः** ( असंसू. ६ )
उष्ण काल, आहार इत्यादींनी होणारा दाह—होणारी अंगाची आग.

**—देह**—पु., **देहस्यौष्ण्यं, देहोष्मा** ( असंसू. २९ )
शरिराचा उष्मा—उष्णता.

**( उष्म )—स्वेद्**—पु., **स्वेद० सोऽष्टधा भिद्यते, पिंडः, संस्तरः, नाडी, घनाश्मा, कुंभी, कूप, कुटी, जेन्ताक इति** ( असंसू. २६.७ )
घाम काढण्याचे—शेकण्याचे ८ प्रकार. पोटीस, तापवलेला दगड, गरम खळगा, गरम खोली इत्यादी ८ प्रकार आहेत.

**उस्र**—पु., **किरणः** ( सुउ. ६०.१९ ) किरण.

## ऊ

**ऊखरज**—न., **लवणद्रव्य०=रोमकम्** ( रा. ६.४० )
मातीपासून तयार केलेले मीठ.
**औषर-क** ( रा. ६.५१ )
सांवर लोण. क्षारयुक्त माती किंवा पाणी यांपासून केलेले मीठ.

**ऊद्र**—पु., **वारिशयप्राणि० जलबिडालः** ( चसू. २८.४० )
पाण्यात रहाणारा एक प्राणी, पाणमांजर.

**ऊनम**—न., **पात्रस्थे जले क्षिप्तस्य लोहादि—भस्मनः उपरिधान्यादिगुरुद्रव्य—स्थापनेनाऽपि हंसवत्तरतः इयं संज्ञा** ( र. ८,२९ )
पाण्यावर धातूचे भस्म टाकले आणि त्यावर गहू इत्यादी टाकूनही जर ते हंसासारखे तरले तर त्या भस्माला ऊनम म्हणतात.

**ऊरु**—पु., **शारीर० अधःशाखायाः प्रत्यङ्गम्, द्वौ ऊरू,** ( डसुशा. ५.४ ) **स्थानम्—जानुवङ्क्षणयोर्मध्यम्,** ( सुउ. ६४.२६ ) **जानूपरितनभागो वङ्क्षणसंधिपर्यन्तम्** ( सुसू. ३५,१२ ) **आयामः—अष्टादशाङ्गुलप्रमाणः, 'प्रमाणतश्च······अष्टादशाङ्गुलावूरू'** ( चवि. ८.११७; सुसू. ३५.१२ )
**'अष्टादशाङ्गुलायामे जङ्घे ऊरू च'** ( असंशा. ८ )
**परिणाहः—त्रिंशदङ्गुलपरिक्षेपौ—ऊरू'** ( चवि. ८.११७ )
**'त्रिंशदङ्गुलपरिणाहौ ऊरू'** ( असंशा. ८.३० )
**प्राशस्त्यम्—अनुपूर्ववृत्तावूरू** ( असंशा. ८.४५ )
शरिराच्या अधःशाखेचे प्रत्यंग. गुडघ्याच्या वर जांघेपर्यंतचा अवयव; मांडी. लांबी स्वतःच्या अंगुलांनी १८ व ३०, वरवर अधिक गोल व खाली कमी गोल अशी मांडी आरोग्याची दर्शक आहे.

**—ग्रह**—पु., **रोग०, ऊरुस्तम्भः** ( चचि. २७.३३ )
एक रोग. मांड्या जखडणे.

**—दौर्बल्य**—न., **रोगलक्षण० ऊर्वोः दौर्बल्यम्** ( चचि. १४,१३३ )
रोगाचे लक्षण. मांड्यांची अशक्तता.

**—नलक**—पु., **अस्थि० ऊरौ स्थितं नलकाकारास्थि 'एकमूराविति'** ( सुशा. ५.१९ )
**'द्वावूरू नलकौ'** ( चशा. ७.६ )
मांडींतील नळी. मांडीचे नळीसारखे हाड. एका मांडीत एक, दोन ऊरू नलक.

**—पिण्डिका**—स्त्री., **प्रत्यङ्ग० षट्पञ्चाशत्प्रत्यङ्गेष्वेका, 'ऊरुमध्ये द्वे ऊरू पिंडिके'** ( चशा. ७.११ )
छप्पन्न प्रत्यंगांपैकी एक. मांडीचा मांसल गोलाकार भाग.

**—मूल**—न., **शारीरस्थान० वङ्क्षणप्रदेशसमीपे 'लोहिताक्ष' मर्मणः स्थानम्** ( असंशा. ७ )
मांडीचे मूळ. जांघेचा वरचा सांधा. लोहिताक्ष मर्माचे स्थान.

**—शूल**—पु., **रोगलक्षण० ऊर्वोः शूलः** ( चसि. ?.१६ ) मांडीत होणारा शूळ.

**–शोष**–पु., रोगलक्षण० ऊरुस्तम्भः ( चसि. २.१६ )
मांडी जखडणे. मांडी सुकणे. एक रोग. एक रोगलक्षण.

**–संग्रह**–पु., रोगलक्षण० **ऊरुग्रहः ऊर्वोराकर्षणमिव स्थितिः** ( चसू. १४.२३ )
मांड्या जखडणे. मांड्यात ओढल्यासारखी पीडा.

**–सदन**–न., रोगलक्षण० **ऊर्वोः सादः सदनम्** ( चसि. ७.४१ ) **ऊर्वोः शक्त्यभावः** ( चसू. १६.८ ) मांड्या गळणे. मांड्यामधील शक्ती गेल्यासारखे वाटणे.

**–साद**–पु.. रोगलक्षण० **ऊर्वोः सादः, अशीतिर्वातविकारेष्वेकः** ( चसू. २०.११ )
८० वातविकारांपैकी एक वातविकार. मांड्या गळाल्यासारखे वाटणे.

**–स्तम्भ**–पु., रोग०, **निरुक्तिः–मेदसा सह श्लेष्मा वातपित्ते अभिभूय स्थैर्यशैत्याभ्यामूरू स्तम्भयेत्। स ऊरुस्तम्भः** ( चचि., २७.१४ ) **ऊर्वोः स्तम्भः, अशीतिर्वातविकारेष्वेकः** ( चसू. २०.११ )
एक वातरोग. मांडी जखडणे. मेदासह कफवातपित्तांना दूषित करून स्थिरता व थंडपणा यामुळे मांड्या जखडतो; त्या कार्यहीन होतात. तो ऊरुस्तंभरोग.

**संप्राप्तिः—मेदोबलोत्कटः कफदोषो मेदसा सह वातादीन् कोष्ठे चितमामं चाशु रुद्ध्वा गौरवादधोगैः सिरादिभिरूरू याति, सक्थिजङ्घोरू च पूरयति, तेन चोर्वोरकर्मण्यता स्तैमित्यं च जायते। स ऊरुस्तम्भः** ( चचि. २७.१०–१२ )

**संप्राप्ती**–मेदाच्या आधिक्याने दुष्ट झालेला कफ कोठ्यात संचित वातादिकांना व आमाला अडवून जडत्वामुळे अधोभागाच्या शिरांच्या साह्याने मांड्यात येतो व त्या सर्वांसह मांड्या, पोटऱ्या, सर्व पाय व्यापतो, त्याने सर्व तंगड्यांची हालचाल नाहीशी होते. त्या जखडल्या जातात. त्याला ऊरुस्तंभ म्हणतात.

**पूर्वरूपम्–प्राग्रूपं ध्याननिद्राऽतिस्तैमित्याऽरोचकज्वराः। रोमहर्षश्च छर्दिश्च जङ्घोर्वोः सदनं तथा॥** ( चचि. २७.१५ )

पूर्वरूप–मांड्या व जांघा जड व गळाल्यासारख्या वाटणे, थंड थंड वाटणे; अंगावर काटा येणे, ज्वर, अरुची, झोप, ओकारी इत्यादी चिन्हे होतात.

**लक्षणम्–गौरवं ध्यानमङ्गमर्दः स्तैमित्यं तन्द्रा छर्द्यरुचिज्वराः पादयोः सदनं कृच्छ्रोद्धरणं सुप्तिः कम्पो दाहः भेदस्फुरणादिरुक् च** ( चचि. २७.१३ )
( असंनि. १५.४९–५४; अहनि. १५.४७–५१ ).

**साध्याऽसाध्यत्वे–नवः साध्यः, सर्वलक्षणयुक्तः पुराणोऽसाध्यः** ( चचि. २७.१९ )

**लक्षण**–चिंतनात मग्न आहे असा दिसतो, अंग दुखणे, जड वाटणे, थंड वाटणे, झापड, ज्वर, ओकारी, पाय उचलता येत नाही, कंप, आग, फूट, स्फुरण. हा रोग नवा साध्य. सर्व लक्षणयुक्त जुना असाध्य.

**चिकित्सा–अवस्थाविशेषेण यद्यप्याढ्यवाते स्नेहः प्रतिषिद्धस्तथापि यदा कफमेदसोर्भूयस्त्वेन परिक्षयः स्यात्तदा स्नेहादिकं कर्म विधीयते** ( सुचि. ५.३९ )

**चिकित्सा**–अवस्थापरत्वे जरी स्नेह वर्ज्य तरी पण कफ व मेद यांचा फार क्षय होतो तेव्हां स्नेह इत्यादी कर्मे आवश्यक. सर्व रूक्ष द्रव्ये द्यावीत, रूक्ष शेक, पोहणे इत्यादी.

**ऊरुस्तम्भचिकित्सित**–पु., अध्याय०, ( चचि. २७.१ )
उरुस्तम्भाची चिकित्सा, एका अध्यायाचे नाव.

**ऊर्ज**–पु.,**कार्तिकमासः** ( चसि. ६.५ )
**इषोर्जौ शरत्** ( सुसू. ६.६ )
"**शरदूर्जसहौ पुनः**" ( चसि.६.५ ) कार्तिक मास.

**ऊर्जस्**–न., बल० **उत्साहः** ( चचि. १.४ )
उत्साह, जोर, बळ.

**–कर**–वि., **बलाधायकम्** ( चचि. १.४ )
उत्साहवर्धक, बलकर.

**–करभेषज**–(परिव०) न., **औषध०, ऊर्जः प्रशस्तभावस्तत्करं साधनमर्थात्स्वस्थत्वेन व्यवह्रियमाणस्य पुंसो जरादिस्वाभाविकव्याधिहरं तथाऽप्रहर्षव्यवायक्षयितात्पशुक्रत्वाद्यप्रशस्तशारीरभावहरम्** ( चक्र. चचि. १.४ )
एक प्रकारचे औषध. उत्साहवर्धक औषध. स्वस्थ व्यक्तीने सेवन केल्यास वृद्धावस्था इ० स्वाभाविक विकार नाशक, शुक्रक्षय नाशक औषध, हे घाम फार येणे, मैथुनाने क्षीण होणे, व शुक्रक्षय इ० अप्रशस्त विकृतिनाशक.

**ऊर्जा**–स्त्री., **उत्साहः यथा 'स्नानमूर्जाबलप्रदम्'**, ( अहसू. २.१६ ) **मनसः प्रहर्षः, 'यथा अनुपानं करोत्यूर्जाम्,'** ( अहसू. ८.५२ ) **प्राणनं, प्रीणनं वा** ( अहसू. १२.६ )

उत्साह. उ०–स्नान ऊर्जा म्हणजे उत्साह व बलदायक आहे. कार्य करण्याची मानसिक संतुष्ट वृत्ती. उ०–अनुपान ऊर्जा म्हणजे संतोष देते. बल. मनाचा आनंद, धातूंची परिपुष्टी, जीवन.

**ऊर्ण–र्णा**–न., स्त्री., **मेषः, मेषा** ( चवि. ७.१३ )
मेंढा, मेंढी; लोकर.

**–नाभि**–पु., **कीट० लूता** ( र. २७.१६ )
एक किडा; कोळी, कांतण.

**ऊर्णांशु**–पु., **मेषलोम** ( चक्र. चवि. ७.१३ )
मेंढ्याचे केस, लोकर.

**ऊर्ध्व**–वि., **श्रेष्ठम्, उपरितनम्** ( असंशा. ६.७ )
वरचा, श्रेष्ठ.

**–कण्टका**–स्त्री., **शतावरी** ( रा. १.२९१ ) शतावरी.

**–कण्टा–कण्टिका**–स्त्री., **महाशतावरी** ( ध. २.२९३ रा. ४.४४२ )
महाशतावरी, मोठी शतावरी.

**–काय**–पु., **कायस्य ऊर्ध्वभागः** ( सुचि. ३.५४ )
शरिराचा वरचा भाग. डोके.

**–ग**–पु., **उदानः** ( चचि. २८.२०९ )
वर जाणारा, संचार करणारा, वरच्या दिशेने गती असणारा, उदान वायु.

**–गम**–वि., **ऊर्ध्वं गच्छतीति** ( अहृसू. ९.११ )
वर जाणारा.

**–गुद**–पु., **मुखरोग० अर्शोगुल्मकफादिभिः अधः प्रतिहतो वायुर्वक्त्रदौर्गन्ध्यं कुर्वन् ऊर्ध्वं याति, स रोगो नामा ऊर्ध्वगुदः** ( असंउ. २५. पृ. १८२ )
एक मुखरोग. मूळव्याध, गुल्म, कफ, इत्यादी कारणांनी ( खाली सरणारा. ) वायु अडवला गेल्याने खाली न जाता वर जातो व तोंडाला मळासारखी घाण उत्पन्न करतो तो. ऊर्ध्वगुद विकार.

**–जत्रुग–गत**–वि., **जत्रुग्रीवामूलं तस्योर्ध्वभागगतम्** ( सुनि. १.१४., सुसू. ४६.४३८. )
जत्रूच्या वर असणारा. मान व गळा यांच्या खालील भागाला जत्रु म्हणतात.

**–जत्रुगद**–पु., **ऊर्ध्वजत्रुगतो रोगः** ( अहृसू. ८.५३ )
जत्रूच्या वरील भागातील विकार. शिरोरोग. कान, नाक इत्यादी डोक्याच्या सर्व भागात होणारे रोग.

**–जत्रुज**–वि., **जत्रुण ऊर्ध्वं जातः** ( चसू. ५.३२ )
जत्रूच्या वरील भागात होणारे विकार. मान व डोके यात होणारे रोग.

**–जत्रूत्थ**–वि., **ऊर्ध्वजत्रुभागो नाम शिरोग्रीवम्, तत्र जायमानो रोगः** ( चचि. २६.१३३ )
पहा 'ऊर्ध्वजत्रुज.'

**–जानु**–वि., **यो जङ्घे संकोच्य उत्तानश्चिरं शेते, यश्चोर्ध्वं तिष्ठति सः "नोर्ध्वजानुश्चिरं तिष्ठेत् इति चिरकालमूर्ध्वजानुस्थितिं निषेधति"** ( अहृसू. २.३७ )
ढुंगण जमिनीला न टेकता गुडघे वर करून पायांवर बसणे. गुडघे वर करून उताणे निजणे. बराच वेळपर्यंत गुडघे उभे ठेवून बसणे वा वर करून झोपणे निषिद्ध आहे.

**–पातन**–न., **पारदसंस्कार०, पातनप्रकारः "ताम्रेण पिष्टिकां कृत्वा पातयेदूर्ध्वभाजने। नागवङ्गौ परित्यज्य शुद्धो भवति सूतकः॥"** ( र. ११.३४ )
**अग्निसंयोगाद् घटसंपुटाधःस्थपारदस्योपरितनघटे आहरणम्। पारदसंस्कारो यत्र चतुर्थांशेन ताम्रेण सह मर्दितं पारदं स्थापयित्वा नागवङ्गविनाशार्थं घटसंपुटे स्थापयित्वाऽग्निनोर्ध्वघटे समाकर्षणं कुर्वन्ति।** ( र. ११.३४ )
पाऱ्यावरचा एक संस्कार. तांब्याच्या चूर्णाशी पारा खलून तो संपुटात खालच्या भांड्यात ठेवून अग्नि द्यावा म्हणजे वरच्या थंड भांड्यात आलेली वाफ थंड होऊन पाऱ्याच्या स्वरूपात त्या भांड्याला चिकटून राहते. याला 'ऊर्ध्वपातन' म्हणतात. या संस्काराने पाऱ्यातील शिसे व कथील खालच्या भांड्यात राहातात व पारा शुद्ध होऊन वरच्या भांड्यात वाफेने जाऊन पुन्हा पातळ होतो.

**–पाद**–वि., **ऊर्ध्वगाः पादा यस्य सः** ( असंशा. १२.१३ )
वर पाय असलेला, वर पाय केलेला.

**–भक्तिक**–वि., **भुक्तस्यानन्तरं यत्सेव्यते तत्** ( चचि. १८.३४ ) जेवणानंतर घेतलेले–घेण्याचे.

**–भाग**–वि., **ऊर्ध्वं मुखेन दोषनिर्हरणं भजते इति, "दोषहरणमूर्ध्वभागं वमनसंज्ञकम्।"** ( चक. १.४ )
ऊर्ध्वभागाने म्हणजे मुखाने दोष काढणारे औषध. वामक. वांतीचे औषध. याला वमन अशी संज्ञा आहे.

**–भागिक**–वि., **वमनद्रव्य०** ( डसुचि. ३४.६ )

**–भाज्**–वि., **ऊर्ध्वं भजते इति ऊर्ध्वभाज्** ( चसू. २६.४१ ) वर जाणारा. वर असणारा.

वरच्या द्वाराने म्हणजे तोंडाने दोष काढणारे वांतीचे औषध.

**–मारुत**–पु., **रोग० ऊर्ध्ववातः** ( सुचि. १.१३ ) एक रोग; वर पोटात व छातीत चढलेला वात.

**–राजी**–स्त्री., **उपरिभागे रेखा** ( अहसू. ७.६ ) वरच्या भागांतील रेघ.

**–रोग**–पु., **जत्रूर्ध्वरोगः** ( अहसू. १८.३ ) वरचे रोग. मान व डोके यांचे रोग.

**–वह**–वि., **ऊर्ध्वं वहति इति, यथोर्ध्वगामि स्रोतः** ( चसि. २.२१ )

वरच्या दिशेने वाहणारे. ऊर्ध्वगामी स्रोतस्.

**–वात**–पु., **श्वासः** ( चचि. २२.४० चक्र ) फुप्फुसातून वर वेगाने वात निघणे म्हणजे श्वास लागणे.

**वातरोग० अधःप्रतिहतो वायुः श्लेष्मणा मारुतेन वोद्गारबाहुल्यं करोति स ऊर्ध्ववातः** ( मानि. ) सारख्या ढेकरा येणे. वाताच्या गतीला कफाने किंवा वायूने खाली जाण्याला अडथळा आला की, तो वर जातो आणि ढेकरा आणतो. एक रोग.

**–वायु**–पु., **ऊर्ध्ववातः** ( अहसू. ४.३ ) एक रोग. पहा 'ऊर्ध्ववात'

**–व्यञ्जन**–न., **ऊर्ध्वचिन्हं ऊर्ध्वरेखात्रयरूपलक्षणाभिव्यक्तिः** ( चशा. ८.५१ ) ऊर्ध्व चिन्ह. कपाळावर तीन रेषा असणे.

**शिरस्**–वि., **ऊर्ध्वं शिरः यस्य सः** ( चशा. ६.२२ ) वर डोके असलेला, वर डोके व खाली पाय असलेला ( गर्भ )

**–श्वास**–पु., **श्वासरोग०** ( सुसू. ३८.५ ) श्वास रोगाचा एक प्रकार. रोगी अधिक काल वर श्वास घेतो व सोडण्याला त्रास होतो.

**–स्रोतस्**–न., **शरीरस्योर्ध्वभागे वर्तमानं स्रोतः** ( चचि. १८.६ )

शरिराच्या वरच्या भागात असलेले स्रोतस्.

**–हर**–वि., **वमनम्** ( चचि. १२.१७ ) वरच्या भागातील दोष काढणारे, वांती करणारे, वांती.

**ऊर्ध्वाग्र**–वि., **ऊर्ध्वमुखम्** ( चइं. ७.२७ ) वर तोंड असलेला.

**ऊर्ध्वाङ्ग**–न., **शारीर० ऊर्ध्वजत्रुभागः, शिरः** ( अहसू. १.५ ) वरचे अंग. मान व डोके.

**आयुर्वेदतन्त्र०, आयुर्वेदस्याष्टाऽङ्गेष्वेकम्, शालाक्यतन्त्रम्, 'यत्रोर्ध्वजत्रुगतानां रोगाणां नेत्रकर्णघ्राणादिसंश्रितानामाश्च्योतनशलाकादिनोपशमो-वर्ण्यते, तदूर्ध्वचिकित्सानामाऽङ्गम्** ( अरु; अहसू. १.५ ) आयुर्वेदाची अंगे आठ. त्यापैकी शालाक्य तंत्र हे एक. त्यात कान, नाक, डोळे इत्यादिकांचे रोग व त्यांवरील अंजन, सळई इत्यादींनी करावयाचे उपचार सांगितले आहेत.

**ऊर्ध्वानिल**–पु., **वातरोग०, ऊर्ध्ववातः** ( अहसू. २१.३ ) एक वातरोग. कोठ्याच्या वरच्या भागात शूल, ढेकरा इ. त्रास निर्माण करतो.

**ऊर्ध्वानुलोमिक**–वि., **ऊर्ध्वहरं अनुलोमहरं च वमनविरेचनद्विविधकर्मकरम्** ( चसू. २६.६९ ) वरच्या मार्गाने जाणाऱ्या वायूची गती अडली तर तो अडथळा नाहीसा करून वायूची गती चालू करणारी वामक व रेचक अशी दोन्ही कर्मे.

**ऊर्ध्वाभिघातिन्**–वि., **ऊर्ध्वजत्रूत्थरोगी** ( सुशा. १०.९) ऊर्ध्वजत्रुरोग असलेला, मान व डोके यांच्या रोगाचा. डोक्याला आघात झालेला ( गर्भ ).

**ऊर्ध्वास्रपित्ति**–वि., **ऊर्ध्वगरक्तपित्तवान्**(सुचि. ३३.१५) वरच्या भागाचे रक्तपित्त असलेला. कान, नाक इत्यादी वरच्या द्वारातून रक्तपित्ताचा स्राव होत असणारा.

**ऊर्मिका**–स्त्री., **मुद्रिका** ( र. ५.२३९ ) अंगठी.

**ऊर्वस्थि**–न., **अस्थि० ऊरौ स्थितमस्थि** ( सुशा. ५.१९ ) मांडीतील हाड.

**ऊर्वस्थिनिर्गमन**–न., **संधिविश्लेष० ऊरुसन्धिविश्लेषः** ( सुचि. ३.२७ )

जांघेच्या सांध्यातून मांडीचे हाड निखळणे.

**ऊर्वी**–स्त्री., **ऊरुः ऊरुः संबन्धि वा** ( सुशा. ७.२२ ) मांडीशी संबंध असणारी. मांडीतील शीर.

**–सिरा**–परिव० स्त्री., **उर्वीमर्मातिसान्निध्यादेकस्मिन् सक्थ्नि ऊर्वी संज्ञे द्वे सिरे** ( सुशा. ७.२२ ) मांडीतील शिरा. उर्वीमर्माजवळच प्रत्येक मांडीत या नावाच्या दोन शिरा असतात.

**ऊष ( र )** पु., **ज्वर० भूमेः ज्वरः, ऊष्मा** ( असंनि. १.५ ) जमिनीचा ज्वर, उष्णता, उष्मा.

**ऊषक**–पु., **क्षारमृत्तिका, वाराणसीसमीपे बडहरदेशे बाहुल्येन लभ्यते** ( सुसू. ३८.३७ ) खारट माती. काशीजवळ बडहरला सापडते.

**ऊषकादिगण**–पु., **"उषकसैंधवशिलाजतुकासीसद्वयहिङ्गुनि चेति। ऊषकादिः कफं हन्ति गणो मेदोविश्ले-**

षणः । अश्मरीशर्करामूत्रकृच्छ्रगुल्मप्रणाशनः ॥" (सुसू. ३७.३८) अस्मिन् गणे अष्टाङ्गसंग्रहे तुत्थकमधिकम्
(असंसू. १६.१७) (अहसू. १५.२३)
खारी माती, सैंधव, शिलाजतु, हिराकस (पांशु व पुष्प कासीत अशी दोन प्रकारची) आणि हिंग यांचा गट. मूतखडा, गुल्म, कष्टाने लघ्वी होणे हे सर्व नाहीसे होते. या गटात अष्टांगसंग्रहकार मोरचूद अधिक घालतात.

**ऊषक्षार**–पु., ऊषरभूमिजातः क्षार०, गुणाः–उष्णोऽनिलघ्नः प्रक्लेदी बलापहश्च (सुसू. ४६.३२४)
खाऱ्या जमिनीतील खार. तो उष्ण, स्रावी, वातनाशक पण बलनाशक.

**–सूत**–वि., ऊषरजातं लवणं, गुणाः–कटुकं छेदि उपयुक्तं सत्कटु (सुसू. ४६.३२१)
खाऱ्या जमिनीतील मीठ. हे तिखट व शरिरातील अनैसर्गिक वाढ नाहीशी करणारे आहे. उपयोग केल्यास रुची तिखट आहे.

**ऊषण**–पु., रस० कटुकः यथा मरीचादीनाम् "रसाः स्वाद्वम्ललवणतिक्तोषणकषायकाः"।
(अहसू. १.१४)
मधुर. आंबट, लवण, कडु, तिखट, तुरट ह्या सहा रसांपैकी एक रस. तिखट. मिरी इत्यादींचा.
न., वनस्पति०=मरिचम् (चचि. १५.१११)
काळे मिरे.
पिप्पलीमूलम् (ध. २.७५) पिंपळमूळ.

**(ऊषणा)**–स्त्री., पिप्पली (ध. २.७३) पिंपळी.

**ऊषर**–वि., लवण–क्षाररसप्रधाना मृत्तिका
(चचि. १६.१७; चवि. १.१८)
खारट माती, मीठ किंवा क्षारयुक्त माती.

**–देश**–पु., दग्धमृदिव प्रदेशः, तत्रस्थं जलं लवणरसयुक्तं भवति (असंसू. ६.९) लवणयुक्ता भूमिः
(चक. १.९)
जळालेल्या मातीसारखी माती असलेला प्रदेश. यातील पाणी खारट असते. खारट जमीन.

**–प्रसूत**–न., ऊषरदेशजम्,=औषरकम्, साम्भारलवणम् (सुसू. ४२.११)
खारट जमिनीतील मीठ, सांबर मीठ.

**ऊषा**–स्त्री., रोगलक्षण० प्रादेशिको दाहः, अग्निना दह्यमानस्यैव दुःखं दाहः, क्षारेणेवोषा (हे अहसू. ७.१९) पित्तजहृद्रोगलक्षणेष्वेकम् (सुउ. ४३.७)
ठराविक भागाचा दाह. अग्नीने होरपळल्यासारखा दाह. क्षाराने होणाऱ्या आगीसारखी आग. पित्तज हृद्रोगलक्षणातील एक.
क्षारमृत्तिका, वस्त्रधावनार्थे उपयुक्ता
(असंसू. २७)
खार असलेली माती, कपडे धुण्याला उपयुक्त.

**ऊषायण**–न., दाह०, ओषः पित्तगुल्मे लक्षणम्, (काचि०) गुल्मचिकित्सा १२ (पृ. १२२)
ठराविक भागाचा दाह. पित्त गुल्माचे एक लक्षण.

**ऊष्मन्**–पु., अग्निः, उष्णत्वं (चशा. ६.१५)
पाचकवन्हिः (चनि. १.२०)
आहारपरिणामकरभाव० तस्य कर्म पचनम्
(चशा. ६.१५)
अग्निः, उष्णता. पाचक अग्नी, पचन हे कर्म असअसलेला शारीर घटक.
पित्तम् (सुशा. ३.१८) औष्ण्यं, शरीरस्थपित्तस्य कार्यम् (सुसू. १५.२)
पित्त. उष्णता. पित्ताचे कार्य.

**(ऊष्म)–स्वेद**–पु., स्वेद०, बाष्पस्वेदः, विधि:–ऊष्मस्वेदस्तु कपालपाषाणेष्टकालोह-पिण्डानग्निवर्णानद्भिरासिञ्चेदम्लद्रव्यैर्वा, तैरार्द्रालक्तकपरिवेष्टितैरङ्गप्रदेशं स्वेदयेत् मांसरसपयोदधिस्नेहधान्याम्लवातहरपत्रभङ्गक्वाथपूर्णां वा कुम्भीमनुतप्तां प्रावृत्योष्माणं गृह्णीयात् । पार्श्वच्छिद्रेण वा कुम्भेनाऽधोमुखेन तस्या मुखमभिसंधाय तस्मिंश्छिद्रे हस्तिशुण्डाकारां नाडीं प्रणिधाय तं रोगिणं स्वेदयेत् । (सुचि. ३२.५)
वाफारा. वाफ देऊन घाम आणणे.
**विधि**–ऊन वाफारा देताना खापर, दगड, वीट, लोखंडी गोळा, अशा वस्तूंना लाल होईतो विस्तवात तापवून त्यावर पाणी किंवा आंबट द्रव्ये शिंपून ओला कपडा गुंडाळून त्यावर या द्रव्याचे सिंचन करून शेकावे. किंवा मांसरस, दूध, दही, तूप, तेल इ० स्नेहद्रव्य, कांजी आणि वातनाशक वनस्पतींची पाने कढई किंवा मोठ्या घड्यात उकळून पांघरूण घेऊन वाफ घ्यावी. किंवा त्या घड्याच्यावर दुसरा घडा पालथा घालून तेथे संधिलेप करावा. आणि वरच्या घड्याच्या एका बाजूला छिद्र पाडून त्यातून हत्तीच्या सोंडेसारखी ३ वळणे असलेली नळी पक्की बसवावी व कांबळा इ० गुंडाळलेल्या त्या व्यक्तीला त्या नळीतून येणाऱ्या वाफेने शेक द्यावा.

**ऊष्माधिक्य**–न., **ऊष्मणः आधिक्यम्, चत्वारिंशत् पित्तविकारेष्वेकः** ( चसू. २०.१४ )
उष्णतेचे आधिक्य, गरमी अधिक वाटणे. चाळीस पित्तविकारांपैकी एक.

**ऊष्मान्त**–पु., **वर्णाक्षरवर्ग० श ष स हा इति** ( चशा. ८.५० )
श. ष. स आणि ह चार व्यंजन वर्ण यांना ऊष्मान्त म्हणतात.

**ऊष्माभितप्त**–वि., **ऊष्मणा संतप्तः, यथाऽग्न्यातपादिना** ( सुनि. ५.३ )
उष्णतेने तापलेला. जसे अग्नी ऊन्ह इ. नी तापलेला.

**ऊष्मायण**–न., **औष्ण्यम्, कुष्ठस्य पूर्वरूपम्** ( चनि. ५.७; ) **पित्तोदरस्यैकं रूपम्** ( चचि. १३.२८ )
उकडणे, उष्णता वाटणे. कुष्ठ रोगाचे पूर्वरूप व पित्तोदराचे चिन्ह.

**ऊह**–पु., **आलोचनज्ञानं निर्विकल्पकम्, मनस एवं कर्म । "इन्द्रियाभिग्रहः कर्म मनसः स्वस्य निग्रहः । ऊहो विचारश्च ततः परं बुद्धिः प्रवर्तते ॥"** ( चशा. १.२१ )
साधकबाधक प्रमाणाने विचार करणे, आलोचना. मनाचे एक कर्म.
ऊह म्हणजे प्रत्यक्ष व संशयरहित असे मिळवलेले ज्ञान.
विचार—म्हणजे त्याज्य व ग्राह्य ठरविणे.
**अश्रुतस्य परिकल्पना** ( सुचि. ५.२९ )
न ऐकलेल्या वस्तूची, गोष्टीची, कल्पना करणे.

**ऊहापोह**–पु., **चर्चा; विचारः, त्याज्यात्याज्य० विवेचनम्** ( चवि. ८.१४९ )
चर्चा-विचार-विवेचन पृथक्करण, ग्राह्याग्राह्यविचार.

**ऊह्य**–न.. **तन्त्रयुक्ति० मनोविषयाणामेकः, यत्संभावनयोह्यते 'एवमेतद्भविष्यति' इति ।** (चशा.१.२०;) **'यदनिर्दिष्टं बुद्ध्याऽवगम्यते तदूह्यम् ।** ( सुउ. ६५.४० )
**"यथापरिसंख्यातमपि यद्यद् द्रव्यमयौगिकं मन्येत तत्तदपकर्षयेत् ।"** ( चसि. १२.४४ )
मनाच्या विषयांपैकी एक. जे न सांगितलेले बुद्धीने जाणणे ते. हे असे होईल असे समजणे. अनेक वनस्पतींच्या योगात असावयास पाहिजे असे ज्या द्रव्याविषयी सांगितले जाते ते ऊह्य; किंवा न सांगता बुद्धीने जाणले जाते ते; तसेच एकूण द्रव्ये सांगितली तरी त्यातील जे अयोग्य वाटेल ते त्या समूहातून काढून टाकणे असा जो विचार तो.

## ऋ

**ऋक्ष**–पु.. न., **नक्षत्रम्, यथाऽऽर्द्रादीनि नक्षत्राणि** ( सुसू. २९.३–४ ) आर्द्रा इत्यादी नक्षत्रे.
**मृग० नीलाण्डः, रोरुरिति प्रसिद्धः, जङ्गालमृगेष्वेकः** ( सुसू. ४६.५४ )
एक हरीण. मांड्या मोठ्या असलेले हरीण. नीलांड, रोरू अशा नावांनीही संबोधितात.
**वन्यपशु० भल्लूकः, अतिलोमशो गुहाशयः पशुः** ( चसू. २७.३५ सुसू. ४६.७२ ) **स मर्कटसदृशलोमशः** ( हे० अहसू. ६.४८ ) **तस्य चर्म घृतेन सह धूपार्थमुपयुज्यते** ( असंउ. ४ ) **चर्मरोमाणि चास्य ग्रह–चिकित्सायां धूपनार्थमुपयुज्यंते** ( सुउ. ६०.३८ ) **तस्य पित्तेन सिद्धं तैलमपस्मारे पाना–भ्यङ्गार्थं प्रशस्तम् ।** ( सुउ. ६१.२४ ) **मांसमस्य यक्ष्मिणे उपयुक्तम्** ( चचि. ८.१५३ ) **वसा तिमिररोगे मधुयुक्ताऽञ्जनार्थमुपयुज्यते ।** ( असंउ. १६ पृ. १२० )
एक वन्य पशु. अस्वल. अतिशय केस असलेला, गुहेत राहणारा, माकडासारखा पशू. याची चामडी व तूप, केस यांचा धूर ग्रहबाधा असतांना उपयुक्त. याच्या पित्ताने सिद्ध तेल अपस्मारावर पिणे व अभ्यंगाकरितां उपयुक्त. मांसक्षयावर; याची वसा दृष्टिमांद्यावर मधातून अंजनाकरितां उपयुक्त.
**ऋक्षदंशेन विषबाधा भवति ।** ( सुक. ७.४२ )
**ऋक्षविषलक्षणम्—व्यालविषवत् कण्डूनिस्तोदवैवर्ण्यसुप्तिक्लेदज्वरभ्रमादयो भवन्ति ।** ( असंउ. ४६ पृ. ३७६ )
अस्वलाने दंश केल्यास विषबाधा होते. खाज, टोचणी, वर्ण वाईट, स्पर्शहानी, ज्वर, भ्रम इत्यादी लक्षणे होतात.

**–जिह्व**–न., **पित्तजकुष्ठ०, ऋष्यजिह्वम्** ( सुनि. ५.७ )
एक पित्तज कुष्ठ.

**–पित्त**–न., **भल्लूकपित्तम्, एतत्सिद्धं तैलम् अपस्मारे पानाभ्यंगेषु प्रशस्तम्** ( सुउ. ६१.२४ )
**विषहरम्** ( असंसू. ८.२९ )
अस्वलाचे पित्त. हे विषहर. याने सिद्ध तेल अपस्मारावर पिण्या व चोळण्यासाठी.

**–प्रिय**–पु., **वनस्पति०=ऋषभ** ( रा. ५.१५८ )
अष्टवर्गापैकी एक वनस्पती.

**–मुख**–वि., **स्वस्तिकयन्त्र० ऋक्षमुखसदृशं यन्त्रम्** ( सुसू. ७.१० )
एक यंत्र, अस्वलाच्या तोंडाच्या आकारासारखे.

**ऋक्षाहा**–स्त्री., **वनस्पति०=महामेदा** ( रा. ५.१६४ )
महामेदा नावाची वनस्पती.

**ऋच्**–स्त्री., **मन्त्र०, यथा पशुपतेः ऋक्, शिवस्तवार्थं कृतो मन्त्रविशेषः, पाशुपत्यऋचः** ( चचि.२.१८ )
वेदातील मंत्र. महादेवाचे स्तवन वर्णिलेला विशेषमंत्र.

**( ऋग् )–वेद**–पु., **चतुर्णां वेदानामेकः** (चसू. ३०.२०)
ऋग्वेद; चार वेदांपैकी एक.

**ऋचीक**–पु., **ऋषि०, जीवकस्य पिता** ( काकसंहिताकल्प २० पृ. २२६ )
एक ऋषि. जीवकाचा बाप.

**ऋजीष**–न., **सोमकल्प० नीरसं सोमलताचूर्णम्** ( काक–रेवतीक० ४ पृ. १८८ )
सोमलतेचे सुकलेले चूर्ण.

**ऋजु**–वि., **सरलम्** ( सुचि. २४.४ ) सरळ.
**प्राञ्जलम्** ( सुसू. १४.२६ )
प्रामाणिक, श्रेष्ठ, शुद्ध, सरळ.
पु., **रोग० भगन्दर०** ( असंउ. ३३ पृ. २४८ )
भगंदर रोगाचा एक प्रकार.
**वनस्पति०=माडः** ( ध. ५.७० )
माड, शिंदी.

**–ग्रन्थि**–स्त्री., **सीवनप्रकारेष्वेकः ऋजुग्रन्थिसदृशो बन्धो यस्यां सेवन्यां सा** ( सुसू. २५.२२ )
एक प्रकारची शिवण. ज्याची गाठ सरळ आहे. असा बंध.

**–वेध**–पु., **अवक्रव्यधः** ( सुचि. १८.२६ )
सरळवेध. सरळ भोक पाडणे.

**–सर्प**–पु., **सर्प० दर्वीकरः** ( सुक. ४.३४ )
नागसर्प.

**ऋजूकरण**–न., **वक्रस्य सरलीकरणम् यथा शल्यस्य गर्भस्य वा** ( सु.७.१७ ) ( सुचि. १५.३ )
वाकडे असलेले सरळ करणे. गर्भ वाकडा असल्यास तो किंवा शल्य सरळ करणे.

**ऋतु**–पु., **काल०** ( चसू. ६.३ )
**कालपर्यायः** ( सुचि. ३.८ )
**शाल्यादीनामंकुरोत्पत्त्यनुकूलकालः** ( सुशा.२.३३ )
काल विभाग. भात इत्यादींना पेरल्यावर अंकुर उत्पन्न होण्याला अनुकूल काल.
**द्विमासात्मकः कालविभागः**
**'द्विमासिकमृतुं कृत्वा षडर्तवो भवन्ति'** ( सुसू. ६.६ ) **ते च "शिशिरोऽथ वसन्तश्च ग्रीष्मवर्षाशरद्धिमाः'** ( अहृसू० ३.१ )
वर्षाचा, दोन दोन महिन्यांचा एक कालखंड, असे ६ खंड. शिशिर, वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद, हेमंत हे सहा ऋतु.
**स्त्रीणामार्तवकालः** ( चनि. ३.१३ )
( सुशा. २.२५; ) **तस्य प्रवृत्तिनिवृत्तिवयः प्रायो द्वादशवर्षादूर्ध्वं प्रवर्तते पञ्चाशतः क्षयं याति** ( अहृशा. १.७ )
**स्रावानुबन्धकालः–प्रायस्तत्स्रावस्त्र्यहं वहति** ( अहृशा. १.७ )
**तदीषत्कृष्णं विगन्धं च** ( अहृशा. १.२३ )
स्त्रीचा प्रत्येक महिन्याचा रजोदर्शनाचा–स्रावाचा काल. वयाच्या बाराव्या वर्षापासून पन्नासाव्या वर्षांपर्यंतचा काल. तो बहुधा तीन दिवस असतो. थोडा काळसर घाण नसलेला असतो.
**गर्भग्रहणयोग्यकालः** ( सुशा. ३.९ )
**स्त्रीणामपत्यफलप्रदः कालः** ( सुशा. ३.६ )
**'आर्तवस्रावदिवसादृतुः षोडशरात्रयः । गर्भग्रहणयोग्यस्तु स एव समयः स्मृतः ॥** ( भाप्रगर्भप्रकरण २ )
गर्भग्रहणाला योग्य काल. ऋतुदर्शनापासून सोळा रात्रींचा काल.
**स्त्रीणां गर्भग्रहणयोग्योऽवस्थाविशेषः ऋतुर्बीजकालः** ( काशा जातीसूत्रीय ५ पृ. ८० ) **'ऋतुर्द्वादशरात्रं भवति दृष्टार्तवः' । यद्दतुः षोडशरात्रस्तास्वाद्यं स्रावदिनत्रयमन्तिमं योनिसंकोचदिनं न गणनीयम्'** । ( सुशा. ३.६ )
**'शुद्धयोनिगर्भाशयार्तवाया मासमपि इति केचित्,'** ( असंशा. १.४० ) **तत्र विशेषः ब्राह्मणीनामृतुर्द्वादशाहमेकादशाहं क्षत्रियाणां दशाहं वैश्यानां नवरात्रमितरासाम्** ( काशा जातीसूत्रीय ५.८० ); **'घृतक्षीरादिनित्यासु मुदितासु कफात्मसु आर्तवं तिष्ठति चिरम्'** ( असंशा. १.६७ ) **ऋतुर्व्यतीतः ऋत्वतः, ऋतौ व्यतीते नार्या योनिर्गर्भाशयः संव्रियते संकोचं याति** ( सुशा. ३.९ )
गर्भग्रहण योग्य अशी स्त्रीची अवस्था. पहिले तीन व शेवटचा एक असे १६ दिवसातले चार सोडून बारा दिवस, योनि, गर्भाशय व रज ही शुद्ध

असलेल्या स्त्रीचा गर्भधारण योग्य काल महिन्याचाही असूं शकतो. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य स्त्रियांचा ऋतुकाल अनुक्रमे १२; ११ व १० दिवसांचा असतो. दूध, तूप इत्यादी नित्य सेवन करणाऱ्या, आनंदित राहाणाऱ्या कफ प्रकृतीच्या स्त्रीचे रज चिरकाल राहाते. ऋतुकालानंतर योनि व गर्भाशय यांचा संकोच होतो.

**—चर्य, चर्या**—पु., स्त्री., **ऋतवः षट्, तेषु चर्या चरणं, वर्तनम्, 'उभयलोकहितमाहारविहारचेष्टितमिति यावत्** ( अहसू. ३.१ ) **ऋतावृतौ चर्या ऋतोर्वा चर्या, "ऋतुचर्या हि शीतोष्णवृष्टिदोषप्रतिक्रिया"** ( असंसू. ९ )

साही ऋतूंमधले वागणे. इहपर लोकी सुखद असा आहार विहार व हालचाल. प्रत्येक ऋतूची चर्या-वागणूक म्हणजे ऋतुचर्या. शीतोष्णवृष्टिजन्य दोषांचा प्रतिकार करणारी वागणूक.

**—चर्याध्याय**—पु., **अध्याय०** ( सुसू. ६.१ )

ऋतूंना अनुसरून वागणूक सांगणारा अध्याय.

**—ज**—वि., **ऋतौ जातः, यथा ऋतुकृतः रोगः** ( चशा. २.४५ )

ऋतूमुळे झालेला किंवा ऋतूमध्ये झालेला रोग.

**—पर्यय**—**ऋतुविपर्ययः, ऋतुविरुद्धः, यथा ऋतुचर्यामतिक्रम्याहारविहारस्वभावादीनां सेवनादीनि** ( सूउ. ३९.२० )

ऋतूचा विपर्यय. ऋतूशी विरुद्ध आहारादी.

**—प्रकृति**—स्त्री., **ऋतोर्वातादिदोषकृतस्वभावः यथा ऋतोर्वसन्तस्य कफप्रकृतिः वर्षाया वातप्रकृतिः शरदः पित्तप्रकृतिः** ( काखि. २.४७ )

ऋतूची प्रकृती, स्वभाव, आत्मगुणकर्म. वातादी दोषामुळे झालेला स्वभाव. वसंताची कफ, वर्षाची वात व शरदाची पित्तप्रकृती होय.

**—प्रवर्तनी**—वि., **स्त्रीणां मासिकस्रावप्रवर्तनकरी यथा शतपुष्पा** ( काकशतपुष्पा ५–६ पृ. १८५. )

रजस्राव निर्माण करणारी बडीशेप इत्यादी.

**ऋतुमती**—स्त्री., **रजस्वला, रजसाभिप्लुता नारी** ( सुशा. २.३१ ) **ऋतुकालयुक्ता** ( चशा. ४.७ ) **गर्भग्रहणयोग्या** ( सुशा. ३.७-८ ) **व्याख्या—"गते पुराणे रजसि नवे चावस्थिते शुद्धस्नातां स्त्रियमव्यापन्नयोनिशोणितगर्भाशयामृतुमतीमाचक्ष्महे ।** ( चशा. ४.७ )

रजस्वला, गर्भग्रहणाला योग्य अशी. जुना रजःस्राव थांबून नवा चालू होऊन स्नान करून शुद्ध झालेल्या व निर्दोष योनि रज आणि गर्भाशय असलेल्या स्त्रीस ऋतुमती म्हणावे.

**लक्षणम्—पीनप्रसन्नवदना प्रक्लिन्नात्ममुखदन्ता नरकामा प्रियकथा स्रस्तकुक्ष्यक्षिकेशा स्फुरद्भुजकुचश्रोणिनाभ्यूरुजघनस्फिक्हर्षौत्सुक्यपरा च** ( सुशा. ३.७.८ ) **ऋतुकाले गर्भाशयस्य मुखं विवृतं भवति, तच्च वायोः क्रियावतः कालसहायस्यायत्तम्, 'विवृताविवृतमुखत्वं हि योनेर्गर्भग्रहणाऽग्रहणहेतुः'** । ( अहशा. १.२२ ) **'ऋतावतीते योनिः सा शुक्रं नांतः प्रतीच्छति'** । ( अहशा. १.२२ )

पुष्ट, प्रसन्न व रसरसलेल्या मुखाची; आर्द्रा—हळुवार मनाची, मुख व दातांना आर्द्रता असलेली जिची कूस शिथिल झालेली, पापण्या नेहमी खाली पडलेल्या डोळ्याची ( अर्धोन्मीलित ) खाली रुळलेल्या केसांची; बाहू, स्तन, ओटीपोट, बेंबी, जांघ व मांड्या यात स्फुरण होत असलेली; प्रेमाच्या गप्पागोष्टी आवडणारी; संभोगाच्या सुखाच्या कल्पनेने आनंद व उत्सुकता खूप वाढलेली; पुरुषाची इच्छा करणारी स्त्री ऋतुमती होय. ऋतुकाळी गर्भाशयमुख खुले असते; गर्भधारणेला ही स्थिती अनुकूल होय. ऋतुकाल संपल्यावर क्रियाशील वायूमुळे ते मुख बंद होऊन गर्भाशयात शुक्र प्रवेश होत नाहीं. योनिमुख खुले वा बंद असणे हे वायूवर अवलंबून आहे.

**—वैकारिक**—वि., **ऋतुविकाराय हेतुभूतः** ( चवि. ३.४ )

ऋतु विकृत होण्याला कारणीभूत.

**—व्यापत्ति**—स्त्री., **ऋतुविपर्ययः, स संनिपातादिज्वरनिदानम्** ( चनि. १.२८ )

ऋतूच्या कालात त्या ऋतूखेरीज अन्य ऋतूची लक्षणे असणे. सन्निपातादी ज्वरांचे ते कारण.

**—संधि**—पु., **शिशिरवसन्तयोर्ग्रीष्मप्रावृषोरित्यादिकयोरन्त्यश्चादिश्च यौ सप्ताहौ तावृतुसन्धिरिति स्मृतौ । पूर्वस्यर्तोरन्त्यः सप्ताहः उत्तरस्य चाद्यः सप्ताह एवं चतुर्दशाहादृतुसन्धिः । तस्मिन्नृतुसन्धौ पूर्वर्तुसंबन्धी विधिः क्रमात् त्याज्यः । उत्तरर्तुसंबन्धी क्रमात्सेव्यः सहसा हि परित्यागशीलनक्रियमाणेऽसात्म्यजा रोगाः स्युः ।** ( हे० अहसु. ३.५८ )

एका ऋतूच्या शेवटचा व पुढील ऋतूचा पहिला आठवडा हे चौदा दिवस ऋतुसंधीचे होत. या कालात चालू ऋतूचा आहार विहार क्रमाने सोडून पुढील ऋतूचा आहार विहार क्रमाने सेवन करावा. नाहीतर असात्म्य आहारविहारजन्य रोग होतात.

**-सात्म्य**-न., **ऋतौ यदुपशेते तत्** ( चसू. ६.३ ) **ऋत्वभिहितान्नपानादि** ( सुसू. ३५.३९ )

ऋतूच्या दृष्टीने शरिराला त्या त्या ऋतूत सांगितलेला जो आहारविहार आत्मसात् होतो-आरोग्यकर होतो ते सात्म्य.

**-सुख**-वि., **यत्र यद्योग्यं सुखावहं वा तदनुसारेणेत्यर्थः यथोष्णकाले शीतस्पर्शं शीतकाले उष्ण स्पर्शम्** । ( चचि. ८.१७९ )

ज्या ऋतूत जे योग्य सुखकारक आरोग्यकारक ते. **जसे**—उन्हाळ्यात थंड स्पर्श व थंडीत उष्णस्पर्श.

( **-सुखा** )-वि., **सर्वेषु ऋतुषु यत्र सुखं भवति तत्स्थानम् यथा कुटी** ( चचि. १.१९ )

सर्व ऋतूंत जी सुखदायक ती. पर्णकुटी, झोपडी.

**ऋतुस्नाता**-स्त्री., ऋतुकालजातंवस्त्रवणादनन्तरं चतुर्थेऽहनि स्नाता ( सुशा. २.४८ ) **तत्रपरिचर्या**-'**पूर्वं पश्येदृतुस्नाता यादृशं नरमङ्गना । तादृशं जनयेत्पुत्रं भर्तारं दर्शयेदतः** ॥ ( सुशा. २.२६ ) **ऋतुमतीपरिचर्या**-'**ऋतौ प्रथमदिवसात्प्रभृति ब्रह्मचारिणी स्यात्, दिवास्वप्नाञ्जनाश्रुपातस्नानुलेपनाभ्यङ्गनखच्छेदनप्रधावनहसनकथनातिशब्दश्रवणावलेखनानिलायासान्परिहरेत्** ( सुशा. २.२५ )

रजोदर्शनानंतर चवथ्या दिवशी स्नान केलेली. स्नानानंतर प्रथम तिने पतीला पहावे. कारण ज्याला ती प्रथम पाहील त्याप्रमाणे मुलगा होईल. ऋतुकाली दिवसा झोप, अंजन, रडणे, स्नान, उटणे, अभ्यंग, नखे काढणे, धावणे, हंसणे, खूप बोलणे, अति ऐकणे, कंगव्याने केस विंचरणे, वारा अंगावर घेणे, श्रम करणे टाळावे; ब्रह्मचर्य पाळावे.

**ऋद्धि**-स्त्री., कन्द० **गौडदेशेप्रसिद्धः लताकन्द०** ( सुसू. ३८.३५ ) '**ऋद्धिर्वृद्धिश्च कन्दौ द्वौ भवतः कोशयामले । श्वेतरोमान्वितः कन्दो लता जातः सरन्ध्रकः ॥ तूलग्रन्थिसमा ऋद्धिर्वामाऽवर्ता फला च सा । वृद्धिस्तु दक्षिणाऽवर्तफला प्रोक्ता महर्षिभिः** ॥ ( रा. ५.१८९-९० )

**सा वृद्धिसहितोपयुज्यते चिकित्सायाम्** ( सुचि. ३७.१३ )

**गुणाः**-**मधुरा, तिक्ता, शीता, सुस्निग्धा, रुचिमेधाकरी, कफवर्धनी, शुक्रवर्धनी** ( ध. १.१४५ ) **बल्या** ( भाप्र. ) **वातपित्तकफघ्नी, क्षयरक्तदोषज्वरघ्नी,** ( ध. ) **कुष्ठ कृमिघ्नी,** ( रा. ) **मूर्च्छाघ्नी** ( भाप्र. )

**ऋद्ध्यभावे वाराहीकन्दो योज्यः, "मेदाजीवककाकोलीऋद्धिद्वन्द्वेऽपिवाऽसति । वरीविदार्यश्वगन्धावाराहीश्च क्रमात् क्षिपेत्** ॥

( भाप्र. मिश्रप्र. ६.१५६ )

एक कन्द. ऋद्धि व वृद्धि असे दोन्ही वेलीचे कंद. पांढरी लव त्यांवर असते. भोके खळगे असतात. त्यांच्यावर वर्तुळे असतात; ऋद्धीची डावीकडे जाणारी व वृद्धीची उजवीकडे जाणारी वर्तुळे असतात. चिकित्सेत ऋद्धि वृद्धीसह उपयोगात आणतात.

**गुण**-कडु, गोड, चांगली स्निग्ध, शीत, तिन्ही दोषनाशक, रुचिकर, बुद्धिवर्धक, पोषक, कफकर, शुक्रवर्धक, बल्य, कृमि व कुष्ठनाशक, मूर्च्छानाशक, क्षय, रक्तदोष व ज्वरनाशक. मेदा जीवक, काकोली, ऋद्धि, वृद्धि यांच्या ऐवजी क्रमाने शतावरी, भुईकोहळा, आस्कंद, डुक्कर कंद. व ऋद्धीबद्दलही डुक्करकंदच घेणे.

**ऋषभ**-**क**-पु., **पशु०, बलीवर्दः, वृषभः** ( सुचि.२६.७ )

बैल. सांड.

**आर्षभचर्म-बलीवर्दचर्म, प्रसवकाले प्रजायिन्या मृदुशयनोपरिप्रच्छादनार्थमुपयुक्तम्**

( असंशा. ३.१२ )

बैलाचे कमावलेले चामडे प्रसूतीच्या वेळी स्त्रीला निजविण्यापूर्वी मऊ अशा शय्येवर आंथरण्याकरिता उपयुक्त.

**अगद० सर्पविषे उपयुक्तः** ( सुक. ५.६८-७३ )

एक विषनाशक योग. सर्पविषावर उपयुक्त.

**कन्द०, वृषशृङ्गसदृशः** ( सुसू. ३८.४-५ )

**वृषभः, कूर्चशीर्षकः** ( सुचि. १७.१० )

**अष्टवर्गान्तर्गतद्रव्येष्वेकम्**

( सुसू. ३८.३५-३६; चसू. ३.२२ )

**शुक्रजननगणेष्वेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१२ ) (१९)

**जीवनीयवर्गे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.९ (१)

**रक्ताऽनिलार्तिहरप्रदेहे** ( चसू. ३.२२ )

**गुणाः**-**स्वादुः शीतो गर्भसंधानकारको बल्यः शुक्रकफवर्धनो वातपित्तघ्नो रक्तपित्तक्षयदाहज्वरा-**

दिरोगघ्नः कार्श्यघ्नः ऋषभाभावे विदारिकन्दोयोज्यः ( ध. १.१२५ ) ( भाप्र. मिश्रप्र. ६.१५६ )
एक कंद. बैलाच्या शिंगाच्या आकाराचा. अष्टवर्ग-द्रव्यापैकी एक. वृषभ, कूर्चशीर्षक ही आणखी नावे. **गुण**-गोड, थंड, गर्भदायक जीवनीयगणातील एक द्रव्य; जखम भरून आणणारा, कफ व शुक्रवर्धक वातपित्तनाशक, बलवर्धक, रक्तपित्त क्षयदाह ज्वरादी रोगनाशक, पुष्टिवर्धक. याच्या अभावी भुईकोहळा वापरावा. रक्त दोषात वात पीडा असतां अंगाला चोपडण्याच्या कामी योग्य.

**–द्विप**–पु., न., **कुरुक्षेत्रात् पूर्वो देश०** ( काखि. २५.८. )
कुरुक्षेत्राच्या पूर्वेकडील एक देश. मगध देश.

**ऋषभक**–पु., **वनस्पति० ऋषभः** ( चसू. ४.९ )
ऋषभ नामक वनस्पती.

**ऋषभी**–स्त्री., **वनस्पति० कपिकच्छुः** (सुसू. ३८. ४–५)
खाजकुहिली; कवचबीज.

**ऋषि**–पु., **तपस्वी, मुनिः** ( चनि. ७.१० ) तपस्वी. मुनि.
**रसरत्नसमुच्चयकर्त्रा सिंहगुप्तसूनुना शास्त्रप्रणयने आधारत्वेन गृहीतानां तन्त्रकृतामेकस्तन्त्रकर्ता** ( र. १.५–९ )
रसरत्नसमुच्चय ग्रंथाच्या कर्त्या सिंहगुप्त पुत्राने शास्त्ररचताना आधारभूत म्हणून ज्या अनेक तंत्र-कारांचे ग्रंथ घेतले त्यांपैकी एका तंत्राचा कर्ता.
**भूताधिपति०** ( असंउ ७ ५९ )
महाभूतांचा एक अधिपती.
**वनस्पति०–दमनः** ( ध. ३.६६ ) दवणा.

**–पुत्रक**–पु., **दमनः** ( ध. ३.६४ ) एक वनस्पती.

**–ऋषड्ढय**–पु., **आयुर्वेदज्ञो ऋषि०, रोगभेदे तस्य मतम् ' षड्रोगाः षड्रसत्वादन्नपानस्येति '** ( कासू. २७.३ )
अन्नपान षड्रसात्मक म्हणून तज्जन्य रोगही सहा अशा मताचा एक ऋषि. ऋषड्ढय.

**–श्रेष्ठा**–स्त्री., **वनस्पति०–ऋद्धि** ( ध. १.१४५ )
ऋद्धि नांवाची वनस्पती.

**–सत्त्व**–वि., **सात्विक प्रकृतिभेदः, सात्विककाय० यस्मिन्मनुष्ये जप–व्रत–ब्रह्मचर्यहोमाध्ययनसेवित्वं विज्ञानज्ञानसंपन्नत्वमित्येबमादयो गुणा दृश्यन्ते सऋषि-कायो ज्ञेयः** ( सुशा. ४.८७ )
सात्विक प्रकृतीचा एक प्रकार. ज्याची प्रवृत्ती जप, तप, व्रत, होम, अध्ययन करण्याकडे असते व जो ब्रह्मचर्य पालन करणारा असून ज्ञानविज्ञानसंपन्न आहे तो ऋषिकाय म्हणावा.

**–सृष्टा**–स्त्री., **वनस्पति–ऋद्धि** ( ध. १.१४५ )
ऋद्धि नावाची वनस्पती.

**ऋष्य**–पु., **जाङ्गलमृग० खरजिव्हो हरिणभेदः, नीलाण्डो हरिणः** ( चसू. २७.४६. सुनि. ५.७ )
**अस्य पित्तं ग्रहचिकित्सायामुपयुज्यते** ( सुउ. ६०.४० ) **ऋष्यचर्ममसी श्वासहरलेहे उपयुक्ता** (सुउ ५१.३८ )
खरखरीत जिभेचा निळसर अंडाचा हरिणाचा प्रकार. याचें पित्त ग्रहबाधेवर. याच्या कातड्याची मषी श्वासनाशक अवलेहांत उपयुक्त.

**–गन्धा**–स्त्री., **वनस्पति०, बृंहणीयवर्गे एकं द्रव्यम्,** ( चसू. ४.९. ( २ ) **मधुरस्कन्धे द्रव्य०** ( चवि. ८.१३९ )
मधुरगण व बृंहणगण यांतील एक वनस्पती. बला प्रकार.

**–जिव्ह**– न., **महाकुष्ठ०, सप्तकुष्ठभेदेष्वेकः " ऋष्यजिह्वाकृतिप्रोक्तमृष्यजिह्वम् "** ( असंनि. १४ )
कुष्ठाच्या ७ प्रकारांपैकी एक. अस्वलाच्या जिभेसारखे खरखरीत कुष्ठ.

**–प्रोक्ता**–स्त्री., **वनस्पति०–अतिबला** (चचि २९.७२)
मोठी बला.
**माषपर्णी** ( चसू. ४.१० ) रान उडीद.
**ऋद्धिः** ( चचि. ३.२५८ ) ऋद्धि नामक वनस्पती.
**शतावरी** ( ध. १.२९१ ) शतावरी.
**कपिकच्छुः** ( असंसू. १५.१२ )
कवच बीज; खाजकुहिली.

## ए

**एक**–वि., **संख्या०** ( चसू. १९.३ )
पहिली संख्या, एक दोन इ. पैकी एक.
**समानम्** ( असंसू, ९.९४ ) सारखे.
**प्रधानम्** ( अहृसू. १२.३२ ) मुख्य.

**–कारण**–न., **प्रधानकारणम्** ( अहृसू. १२.३२ )
मुख्य कारण.

**–काल**–अ., **एकवारम्** ( सुउ. ६४.३२ )
**समानकालत्वम्** ( असंशा. २ )
सारखा वेळ. एक वेळ अनेकांची.

**–कालिक**–वि., **एकवारं प्रयुज्यमानम्** ( सुउ. ६४.५६ )
एका वेळेचे, एका वेळी योजलेले, एक वेळ दिलेले.

**–कुष्ठ**–न., क्षुद्रकुष्ठ०, **वातकफाऽधिकं कुष्ठम्** ( चचि. ७.२९. ) **लक्षणम्–अस्वेदनं महावास्तु मत्स्यशकलोपमम्** ( चचि. ७.२१ ) क्षुद्र कुष्ठाचा एक प्रकार. घाम येत नाही. त्वचेचा मोठा अखंड भाग व्यापणारे व माशाच्या खवल्या-प्रमाणे पापुद्रे ज्याचे पडतात तो कुष्ठ रोग.

**–कोलीसक**–पु., **कोष्ठिकायां संस्थापितायाः मूषिकाया उपरि शिखरवदापूर्णभरिता आध्मानेन च मूषाकण्ठोपरितनभागपर्यन्तमागताः कोकिलाः** ( र. ८.३५ )
भट्टीमध्ये असलेल्या मुशीच्या वर शिखरासारखे कोळसे भरून अग्नी लावल्यानंतर भस्त्याने ( भात्याने ) वारा घालून पेटलेले आणि मुसेच्या गळ्यापर्यंत आलेले कोळसे.

**–ताल**–न., यन्त्र० **कर्णनासानाडीशल्यानामाहरणार्थम् तालं नाम प्रदेशः, एकं तालं एकः प्रदेशो यस्य तत्, एतेन मत्स्यशकलवत् प्रतनुमुखैकप्रदेशमेकतालम् तत्प्रमाणं द्वादशाङ्गुलानि** ( सुसू. ७.१२ ) कान, नाक इत्यादी पोकळ भागांत असलेले शल्य काढण्याकरिता एक यंत्र. माशाच्या खवल्याप्रमाणे एक टोक असलेले यंत्र. ताल म्हणजे प्रदेश. एक प्रदेश असलेले यंत्र.

**–त्व**–न., **एकी भावः, संमूर्च्छनम्** ( सुनि. ६.४ ) एकीकरण. एकत्र येणे. एकामेकांत मिसळणे. एक-रूप होणे. एकतानता.

**–देश–एक भागः** ( असंसू. ७.२१० ) अंशात्मक एक भाग. एक विभाग. एक अंश.

**–देशप्रकोपण**–न., **दोषाणां स्ववैगुण्याद् दोषः खेषु सज्जमानस्तत्र विकृतिं जनयति । एवं तत्तद्देशे दोषप्रकोपणं भवति** ( चचि. १५.३७-३८ )
स्वतः दूषित झालेला दोष स्रोतसांत राहून तेथे विकृति उत्पन्न करतो असेच निरनिराळ्या दोषाचे त्या त्या स्थलात प्रकुपित होणे.

**–दंष्ट्र**–पु., **सविषप्राणि० तेन दष्टेन शोफो रुक् पीतत्वं तृष्णा च जायते** ( चचि. २३.१५४ )
एक विषारी प्राणी. तो डसल्याने सूज, वेदना, पिवळेपणा, व तहान होते.

**–द्वार**–वि., **एकमुखः, यथाबस्तिः** ( असंशा. ७.९ )
एक तोंड असलेला. बस्ति ( या अवयवाला एकच द्वार आहे. )

**–नाडिका**–स्त्री., **एक घटिका** ( असंसू. ८.५६ )
एक घटका.

**–नाभिक**–पु., **एकनाभिनाडिकः, यमगर्भयोरेका पोषिका गर्भनाभिनाडी अपरासंबद्धा प्रथमत एकैव, तयोर्विशेषः–'तुल्यं मरणजीवितम्'**
का० रेवतीकल्प ॥ ५८ ॥
जुळ्यागर्भावस्थेत जेव्हां दोन्ही गर्भांची नाळ एके ठिकाणी जुळलेली असेल तेव्हां प्रत्येक गर्भ एक–नाभिक म्हटला जातो. वारेपासून प्रथम एक नाळ असलेल्या गर्भां पैकी प्रत्येक. त्यांचे मरण व जीवन एकच असते. एकच वार असलेला.

**–नाभिप्रभव**–वि., **गर्भावस्थायां ययोः पोषिका नाडी एकैव तावेकनाभिप्रभवौ यमगर्भौ, तयोरेक एकनाभिप्रभवः** ( का० रेवतीकल्प ॥ ५६ ॥ )
एकच वार असलेला, एका वारेपासून पोषण असलेल्या जुळ्यापैकी एक गर्भ.

**–पक्ष**–पु., **देहस्यार्धभागः, दक्षिणो वामो वा** ( चचि. २८.५३ ) **अन्यतरपक्षः** (असंनि. १५.४१) शरिराचा अर्धाभाग. उजवा किंवा डावा अर्धा भाग.

**–पत्रिका**–स्त्री., **वनस्पति०=गन्धपलाशः** ( रा. ६.८९ ) नागदवणी, हळद.

**–पशु**–पु., **श्रेष्ठपशुः** ( चइं. १२.७३ ) श्रेष्ठ पशु.

**–माता**–स्त्री., **वनस्पति० इयं विषहरा** ( असंउ. ४० )
विषहर एक वनस्पति.

**–मार्ग**–पु., **एक एव मार्गो यस्य सः, यथा एकमार्गाश्रयो व्याधिः** ( अहसू. १.३१ )
शरिरातील तीन मार्गांपैकी एकाच मार्गांत असलेला जो रोग तो एक मार्ग ( रोग ).

**–योनि**–स्त्री., **एक कारणम्** ( अहसू. ६.४२ )
अनेकांचे एक कारण. एका कारणापासून झालेले अनेक.

**–रससात्म्य**–न., **एक एव रसो यस्योपशेते सः, एकरससात्म्यस्य पंचरसा असात्म्या भवन्ति**
( चवि. ८.११८ )
सवयीने एकच रस आत्मसात् केलेला. अर्थात् त्याला बाकीचे ५ रस आत्मसात् होणारे नसतात.

**–रसाभ्यास**–पु., **एकरसस्य सततं नियमेन सेवनम् । दौर्बल्यकराणां श्रेष्ठमेतत्** ( चसू. २५.४० ); **'एक रसाभ्यासो दौर्बल्यारोचकान्यतमदोषप्रकोपकराणां श्रेष्ठः** ( असंसू. १३ )

एकाच रसाचे नियमाने नित्य सेवन करणे हे दुर्बलता किंवा अरुची निर्माण करणाऱ्या कारणातले श्रेष्ठ कारण; त्या रसाला अनुरूप अशा एका दोषाचा प्रकोप करणाऱ्या कारणामध्ये प्रधान कारण.

**–रूप**–न., **एकं लक्षणम्** ( अहृसू. २४.२२ )
एक लक्षण असणे. एक सारखे. ( अंधकाररूप ) भेदविरहित.

**–वीर**–पु., **वनस्पति॰ कटुकः उष्णस्तोद–गृध्रसी–कटिपृष्ठादिशूलपक्षाभिघातनुत् वातघ्नश्च** ( रा. परि. ८.८ )
काटे असाणा. गुण–तिखट, उष्ण, वातनाशक. गृध्रसी, कंबर, पाठ इत्यादी ठिकाणाचा शूळ व अर्धांगवात नाशक.

**–वृन्द**–पु., **कण्ठगतरोग॰ लक्षणम्–कफरक्तजो वृत्तोन्नतो यः श्वयथुर्मन्ददाहः कण्डूयुतोऽपाक्यगुरुर्मृदुश्चासौ व्याधिर्नाम्नैकवृन्दः** ( सुनि. १६.५५ ) **एकवृन्दो गलपार्श्वगो रोग इत्युक्तम्** ( असंउ. २५ ) **चिकित्सा–एकवृन्दं जलौकादिभिर्विस्राव्य शोणितावसेचनं कृत्वा शिरोविरेचन–धूमलेपन क्षारादिभिः तत्र शोधनं करणीयम्** ( सुचि. २२.६६ )
गळ्यातला एक रोग. कफ रक्तापासून वाटोळी वर आलेली सूज, थोडा दाह, खाज, थोडी जड, थोडी मऊ न पिकणारी सूज. **उपाय**–जळवा इत्यादी लावून रक्त काढून, शिरोविरेचन, धूम्रपान, लेप, क्षार, इत्यादींनी दोषांचे शोधन करावे.

**–शफ**–पु., **एको द्विविधाऽभिन्नः शफः खुरो यस्य सः यथा अश्वादिः** ( चसू. २७.२२१ )
संपूर्ण एक खूर असलेले घोडा, गाढव इ॰ पशु

**–( शफा )**–स्त्री., **वडवादिः** ( असंशा. १२ )
**एकशफाक्षीरस्य गुणाः–अश्वतरीखरीमृगीखड्गिनीनां दुग्धं रसेन मधुराम्लं, लवणानुरसं, वीर्येणोष्णं, रूक्षं, लघु, बल्यं विशेषतः शाखागतवातहरं च** ( सुसू. ४५.५६-५७ ) **स्थैर्यकरम्** ( चसू. २७.२२१ ) **घृतगुणाः–कषायमुष्णवीर्यं पाके लघु कफनाशनं दीपनं बद्धमूत्रं च** ( सुसू. ४५.१०२ ) **विड्बन्धकरम्** ( ध. ६.१७४ ) **मांसगुणाः–सलवणं, मेषमांसवद् गुणेन** ( सुसू. ४६.९० ) **वसा–जाङ्गलानामेकशफानां वसा, पित्तगुल्मेऽनुवासनार्थं हिता** ( सुउ. ४२.२३ ) **लघुशीतकषाया रक्तपित्तघ्नी** ( सुसू. ४५.१० )
घोडी, गाढवी, हरिणी, गेंडी यांचे **दूध**–गोड, आंबट, थोडे खारट, उष्ण. रूक्ष, बलदायक व हलके. हात पाय यांतील वात नाहीसे करणारे. स्थिर गुण निर्माण करणारे.
**तूप**–तुरट, उष्ण, हलके, कफनाशक, अग्निदीपक, लघ्वी कमी करणारे, मळ बांधणारे.
**मांसाचेगुण**–थोडे खारट व मेंढ्याच्या मांसासारखे. वसा–एकखुरी सर्व जांगल प्राण्यांची **वसा**–पित्तगुल्मावर अनुवासन बस्ती करतां उपयुक्त; रक्तपित्त नाशक.

**–सक्थिप्रतिपन्न**–पु., **मूढगर्भ॰, एकेन सक्थ्ना योनिमुखमागतः । सुश्रुते मूढगर्भप्रकारेष्वयं द्वितीयः मूढगर्भः** ( सुचि. १५.९ )
एक प्रकारचा मूढगर्भ, अडलेला गर्भ; योनीच्या तोंडाशी एकच मांडी आलेला गर्भ.

**–सरगम**–पु., **विषापहो गण॰,** ( सुक. ५.८४–८६ ) विषनाशक एक गण.

**एकतोमुख** न., **नाडीयत्र॰, तत्स्रोतोगत शल्योद्धरणार्थं रोगदर्शनार्थमाचूषणार्थं क्रियासौकर्यार्थं च यथा रक्ताहरणार्थमलाबुभगन्दरार्शोयत्रादीनि** ( सुसू. ७.१३ )
नळीसारखे एक यंत्र. स्रोतसातील शल्य काढणे, रोग कोठे आहे ते शोधणे, व शस्त्रकार्य सुलभतेने करणे, रक्त काढणे इत्यादी करता उपयोगी. तुंबडी, अर्शोयंत्र इत्यादी.

**एकाख्य**–न., **कुष्ठरोग॰, 'एकाख्यं महाश्रयम्' अस्वेदं मत्स्यशकलसन्निभम्** ( असंनि. १४.२२ )
कुष्ठ रोगाचा प्रकार. पहा. 'एक कुष्ट.'

**एकाङ्ग**–न., **शरीराङ्गानामेकम्** ( मानि वात ४ )
शरिराच्या अनेक अंगांपैकी एक अंग
पु., **वातरोग॰, पक्षवधः** ( र. २१.१६४ )
एक वात रोग. अर्धांगवात. पक्षाघात.

**एकाङ्गक** पु., **एकाङ्ग वातरोग॰, रेवतीरोषसंभूतः** ( का॰ बलिग्रहचि. ( पृ. १०० )
रेवती ग्रहाने झालेला अर्धांगवात रोग.

**एकाङ्गवात**–पु., **शरीरप्रत्यङ्गानाम् अन्यतमाङ्गगतो विकृतो वातः** ( सुचि. ४.११ )
शरिराच्या प्रत्यंगांपैकी एखाद्या अंगात शिरलेला प्रकुपित वात. एका अंगात विकृत झालेला वात.

**एकाङ्गरोग**–पु., **वातरोग अशीतिर्वातविकारेष्वेकः एकाङ्गव्यापकः, यथा ज्वरादिषुशीतत्वादीनाम्,**

कदाचिदेकव्यापकत्वम् ( चसू. २०.११ ) **पक्ष वधः, गृहीत्वार्धं तनोर्वायुः सिराः स्नायुर्विशोष्य च ।……एकाङ्ग रोगं तं केचिदन्ये पक्षवधं विदुः ॥** ( असंनि. १५.४२ )

एक वातविकार. एक अंग त्याने व्यापलेले असते. पक्षाघात. वायु शरिराचा अर्धाभाग व्यापून शिरा व स्नायु शुष्क करून हा रोग ( अर्धांग वात ) करतो. ज्वर इत्यादी मध्ये थंडावा उष्णता इ० एकाच अंगात ( अर्ध्याशरिरात ). कांहीं लोक यालाच पक्षवध म्हणतात.

**एकाङ्ग–वात**–पु., रोग० **शरीरस्यान्यतरभागे तोदः कृशता पुनः पुनश्चलनं शीतस्पर्शश्चेति वर्तन्तेऽस्मिं-ल्लक्षणानि** ( र. २१.६७ )

**लक्षणे**–शरिराच्या कोणत्या तरी एका भागात टोचणी, पुनः पुनः अवयव हालणे, स्फुरण होणे, थंड थंड वाटणे आणि तो भाग सुकणे, वाळणे कृश होणे.

**एकाङ्ग–विकार**–पु., **एकाङ्ग रोग०, एकस्मिन्नङ्गे य उत्पद्यते सः** ( ड ) सुसू. १४.३० )

शरिराच्या एका अंगात उत्पन्न होणारा रोग.

**एकाङ्ग–संश्रित**–वि., एकस्मिन्नङ्ग **एवाश्रितः रोगादिः** ( चचि. २८. १९ )

एका अंगाचा आश्रय केलेला रोग.

**एकाधिष्ठानीय**–पु., **एकस्मिन्नधिकरणे स्थितः । समानाधिकरणः** ( चवि. ६.१० )

एका अधिष्ठानावर असलेला. समान अधिकरण असलेला.

**एकान्त**–पु., **तन्त्रयुक्ति० सर्वत्र यदवधारणेनोच्यते स** एकान्तः, **यथा त्रिवृद्विरेचयति, मदनफलं वाम-यति एव** ( सुउ. ६५.२३ )

एक तंत्रयुक्ति. सर्वत्र निश्चित झालेले जे बोलले जाते ते. जसे तेड रेचक आहे. गेळफळ वामक आहे.

**अतिशयः** ( सुउ. ३९.१०० )

अतिशय. तेच; दुसरे काही नाही.

**एकान्तग्रहण**–न., एकपक्षाश्रयित्वम् ( चवि. ३.३६ )

एका पक्षाच्या आश्रयी असणे.

**एकान्तग्राहिन्**–वि., **एकस्यैव पक्षस्य दुराग्रहेण ग्रहणं करोति इति** ( चवि. ८.१७ )

दुराग्रहाने एकच पक्ष धरून बसणे.

**एकान्तनियम**–पु., **निश्चितनियमः** ( असंसू. ७.२१२ )

निश्चित झालेला नियम; अटळ नियम.

**एकान्ततः**–अ., **निश्चयेन** ( सुशा. ३.१६ ) निश्चयाने.

**एकान्तर**–वि., **एकमन्तरीकृत्य भवति तत्** ( असंसू. ९ )

एक सोडून दुसरा, एकाचे अंतर ठेवून.

**एकान्तरीकृत**–वि., **एकमन्तरीकृत्य यत्कृतं तत्** ( अहृसू. ७.४८ )

एकमध्ये सोडून. जेवणाचा एक काळ मध्ये सोडून.

**एकायाम**–पु., **वातरोग० अर्दितम्** ( असंनि १५.३९ )

अर्दित विकार; तोंड वाकडे होणे. एक वात रोग.

**एकावर्त**–वि., **एकाऽऽवर्ताकाराज्वाला यस्य सोऽग्निः । सविषं हि प्राप्यान्नं बहून्विकारान् भजत्यग्निः । स्फुटतिच सशब्दमेकावर्तो विहतार्चिरपि च स्यात् ।** ( चचि. २३.१०८.१०९ )

वर्तुळाकृति एक ज्वाला ज्याची असा अग्नी. विषयुक्त अन्न टाकल्यावर चटचट आवाज, ज्वाला वळसे घेतल्यासारख्या, यांबून थांबून होणे अशी पुष्कळ लक्षणे ज्या ठिकाणी अग्नीवर दिसतात तो अग्नि.

**एकाशन भोजन**–न., **एक काल भोजनम्; तत् सुख-परिणामकराणां श्रेष्ठम्** ( चसू. २५.४० )

चोवीस तासातून एक वेळ भोजन करणे. ते सुखाने पचण्याच्या दृष्टीने श्रेष्ठ आहे. सुखाने पचणाऱ्या जेवणामध्ये श्रेष्ठ आहे.

**एकाशिन्**–वि., **एकाक्येवाश्नाति सः । तच्चासुरत्व-लक्षणम्** ( सुशा., ४.८८.८९ )

एकटाच जेवणारा. ते असुर-दैत्य प्रकृतीचे लक्षण आहे.

**एकाष्ठील**–पु., **वनस्पति० राजार्कः** ( ध. ४.१६ )

पांढरी रुई.

**( एकाष्ठीला )**–स्त्री., **वनस्पति०=पाठा** (चसि. १०.२३)

पहाड मूळ.

**एकेषीका ( एकैषिका )**–स्त्री., **वनस्पति०, अंबष्ठेति** ( **चक्रः**, चचि. ३.२६७ )

मयूरशिखा, मोरशिखा.

**त्रिवृदिति जेज्जटः, एकैषीकेति जेज्जटपाठः** ( चचि. ३.२६७ ) नळीचे तेड.

**शतावरी** ( सुचि. १७.१४ ) शतावरी.

**शुक्लमूला, त्रिवृत्** ( सुसू. ७.६ ) पांढरे तेड.

**मांसी** ( इन्दुः ), ( सुसू. ४५.१२६ ) जटामांसी.

**महादूर्वा** ( ई, असंउ २६ ) मोठी दूर्वा.

**मयूरशिखा** ई, ( असंउ ६ पृ. ५२ ) मोरशिखा.

**बकपुष्पवृक्षः** ( असंचि. १४. ) एक वनस्पती.

**एकैषिकातैल**–न., तैल०, गुणाः—मधुरमतिशीतं पित्तहरमनिलप्रकोपणं श्लेष्माऽभिवर्धनं च ( सुसू. ४५.१२६ )
पहाडमूळ सिद्ध तेल. हे मधुर, अतिथंड, पित्तहर, वातकफवर्धक आहे.

**एडक**–पु., मेषः ( चइं. १.१४ ) मेंढा.
अरण्यच्छागलः ( चक्र० चइं. १.१४ ) रान बकरा.

**( एडका )**–स्त्री., तृष०=मुस्ता एरका ( सुचि. ७.२४ ) नागर मोथा.

**एडगज**–पु., वनस्पति=चक्रमर्दः ( ध. ४.४ ) टाकळा, तरोटा.

**एण**–पु., जाङ्गल पशु० ( चसू. २७. ४६ )
जङ्घालवर्गीयः ( चसू. ४६.५५ )
कृष्णहरिणः ( सुसू. ४६.३३३ )
गुणाः—' कषायो मधुरो हृद्यः पित्तासृक्कफरोगहा संग्राही रोचनो बल्यो ज्वरापहश्च ( सुसू. ४६.५५ )
' एणस्य षड्रसत्वेऽपिकषायमधुरोत्कटत्वात् कषाय-मधुर इत्युक्तम् । एणस्तु प्रमेहिणामहितो बस्ति-शोधनत्वात् ( डसुसू. ४६.५५ )
एणादी नामसृक् रक्तधातुः—रक्तपित्तेऽतिनिः स्रुतरक्ते क्षौद्रेण पिबेत् ( सुउ. ४५.२८ )
अतिप्रवृत्ते रुधिरे एणस्य रुधिरं दीयते ( सुसू १४. ३६ ) काकोल्यादिक्वाथं वा शर्करामधुमधुरं पायये-देणहरिणोरभ्रशशमहिषवराहाणां वा रुधिरंक्षीरयूष-रसैः सुस्निग्धैश्चाश्नीयात् ( सुसू. १४.३६ )
एणमांसं मृगमांसानामग्र्यम् ( चसु. २५.३८ ); तन्मधुरं मधुरपाकि त्रिदोषशमनं शिवं लघु बद्धविण्मूत्रं शीतं च ( चसू. २७.७७–७८. )
क्रव्यभुगेणमांसयोः ससैन्धवः पुटाह्वयः ससर्पिः समधुरस्तिमिरेहितः ( सुउ. १७.३५. )
काळा हरिण.
सहारसयुक्त गोड व तुरट, रस अधिक. हृदयाला हितावह; पित्तकफ, रक्तपित्त नाशक; रुचिकारक, ज्वरघ्न, बलकर, मळाला बांधणारा, बस्तिशुद्धि करणारा म्हणून प्रमेहीला वर्ज्य. रक्तपित्तात अति-रक्तस्राव झाला तर याचे रक्त मधाबरोबर द्यावे. काकोल्यादी औषधीगणाचा काढा साखर, मध असे मधुर द्रव्य घालून ह्या हरिणाप्रमाणेच इतर हरिण, मेंढा, ससा, रेडा, किंवा डुक्कर यांचेही रक्त दूध, धान्याचे कढण किंवा तूप इ. स्निग्ध द्रव्ये घालून द्यावे. याचे मांस सर्व हरिण मांसात श्रेष्ठ. चरकाचार्यांच्या मते त्रिदोष नाशक, हलके व मळ व मूत्र प्रवृत्ती कमी करणारे आहे. गिधाड, एण, यांच्या मांसाचा पुटपाक सैंधव, मध, तूप घालून दिल्यास वातज दृष्टीविकारावर चांगला.

**–पद–पदी–पदा**–पु., स्त्री. संकीर्णलता० स च ' उपादिके ' त्युच्यते । दंशलक्षणानि दंशः पर्यन्तेषु रक्तवर्ण आकृत्या कृष्णतिलाऽऽकृतिर्दाहमोहाऽग्नि-वीसर्पतृड्वमिश्वासकासयुक्तश्च भवति । ( एणपदी ) ( असंउ. ४४ ( पृ. ३६२ ); ४५. ( पृ. ३७३ )
सोऽसाध्यः ( सुक. ८.१२५ )
एक विषारी किडा. काळ्या तिळासारख्या आकाराची लाल कड असलेली दंशाची जखम होते. दाह, श्वास, खोकला, ओकारी, तहान, धावरे, मूर्च्छा ही लक्षणे होतात. असाध्य.

**( एणी )**–स्त्री., कृष्णमृगी, हरिणी; अस्याः शकृद्रसक्षीर-मांसरसरुधिरैर्द्राक्षाश्वगन्धामगधासिताभिः सिद्धं घृतं शोषघ्नम् ( सुउ. ४१.४९ )
काळी हरिणी. हिच्या मांसाचा रस, रक्त, दूध, लेंड्यांचा रस, द्राक्षे, आसकंद, पिंपळी व साखर यांनी सिद्ध तूप क्षय नाशक.

**–पद**–पु., मण्डलीसर्प० ( सुक. ४.३४ ( २ )
मण्डले असलेला सर्प. मणेर.

**( –पदा– )** वि., स्त्री., हरिणीपदा तथा ( जङ्घा ) ( चशा. ८.५१ ) हरिणीच्या मांड्या सारखी.

**( –पदी– )** स्त्रीं., एणपदा ( सुक. ८.१२५ )

**एनोभाक्**–वि., पापभाजनम् ( सुसू. २.७ ) पापी.

**एरका**–स्त्री., वनस्पति० होग्गलः, शिरोरुजायां प्रदेहे लोहैरकापद्मकचोरकैश्च ( चसू. ३.२४ )
( चचि. २९.१३४ ) लव्हाळा.
मुस्तातृणम् ( चसू. ३.२७ ) नागरमोथा.
गुन्द्रा ( चसू. ३.२७ ) शर, वाणगवत, मृदु दर्भ.
एडका, एडा ( ड.सुचि. ७.२४ ) एक वनस्पती.

**एरण्ड**–पु., वनस्पति०, क्षुपजातीयः श्वेतरक्तभेदाद्द्विधा ( ध. १.२९५ )
वातशमनः ( चसू. ३९. ७ )
अङ्गमर्दप्रशमनः ( चसू. ४.१७ ( ४४ )
नाडीस्वेदे उपयुक्तः ( चसू. १४.३१ ) स्वेदोपगः ( चसू. ४.१३ ( २२ ) एरण्डपत्रं वातजव्रणे आच्छादनार्थमुपयुक्तम् ( सुचि. १.११२ )
एरण्डमूलं वृष्यवातहराणां श्रेष्ठम् ( चसू. २५.४० )
आस्थापनेपूपयुक्तम् ( चसू. २.१२ ) एरण्डबीजम्

**एरण्डबीजमज्जा, सा विशेषेण स्नेह भूयिष्ठा, विरेचनार्थमुपयुज्यते** ( सुसू. ३९.४ ) **एरण्डबीजोद्भवस्नेहः=एरण्डतैलम्** ( सुसू. ४४.७५; ) **एरण्डगुणाः–तिक्तः स्वादुरुष्णो गुरुर्वृष्यो वातघ्न उदावर्तप्लीहारोगगुल्मबस्तिशूलान्त्रवृद्धिशोणितविकारघ्नः** ( ध. १.१२५ )

हिं.—एरण्ड, सफेद एरण्ड.
म.—एरंड.
गु.—धोलो एरण्डो.
बं.—भेरेण्डा.
त.—आमणक्कु.
फा.—बेदंजीर.

एक वनस्पती. एरंड. पांढरा व लाल. वातशमन, अंगदुखणे कमी करणारा, घाम काढण्यास व बस्ती करितां मदत करणारा. **पान**–वातज व्रणावर आच्छादना करिता. **मूळ**–शुक्रवर्धक व वातहर द्रव्यात श्रेष्ठ **मगज**–रेचक, स्नेह अधिक असलेला, धुरीकरिता उपयुक्त. **गुण**–गोड, कडवट, उष्ण, जड, शुक्राला हितकर, वातनाशक, उदावर्त, प्लीहावृद्धि, गुल्म, बस्तिशूल, अंतर्गळ व रक्ताचे विकार नाशक.

**–जटा**–स्त्री., एरण्डमूलम् ( अहृसू. १७.२ ) एरंडमूळ.

**–तैल**–न.,स्नेह०**एरण्डबीजोद्भवः स्नेहः एरण्डतैलम्** ( सुसू. ४४.७५ ) **तद्विरेचनम् ' विरेचने एरण्डतैलं श्रेष्ठम्** ( चसू.१३.१२ ) **मधुरं कटुकषायानुरसमुष्णं गुरुतीक्ष्णं, मधुरपाकि, दीपनं सूक्ष्मं स्रोतोविशोधनं त्वच्यं वृष्यं बल्यमधोभागदोषहरं योनिशुक्रविशोधनं रसायनम्** ( सुसू. ४५.११४ ) **कफवातहरं श्लेष्माभिवर्धनं वातरक्तगुल्महृद्रोगजीर्णज्वरहरम्** ( २७.२८९ ) **एरण्डजं तैलं यथादोषानुबन्धं पयोमांसरस–त्रिफला–यूष–मूत्र–मदिरादिभिः युक्तं सत् मेदः कफसंसृष्टेषु गुल्मोदरब्रध्नादि व्याधिषु, गृध्रस्यादि सर्ववातरोगेषु मेदः कफपित्तरक्तेन विबद्धमार्गे वाते च प्रशस्तम्** ( चचि. २६.२७–२८ ) **रक्तैरण्डस्य तैलमुदर्व्याधौ अनुवासनार्थमुपयुज्यते** ( असंचि १७. ( तप्रपृ. ९८ ) **बस्तिपार्श्वजानूरुत्रिकपृष्ठास्थिशूलाऽऽमवातशोफकुष्ठघ्नम्** । ( ध. ६.१३१ ) **तदुपयोगाः––कषायस्वादुतिक्तैश्च योजितं पित्तघ्नम्, एरण्डतैलं कुष्ठत्रिकटुकान्वितं लिह्यात्, सुखोदकमनु पिबेत् इत्ययं विरेचको योगः त्रिफलाक्वाथेन त्रिगुणेन युक्तमैरण्डतैलं पीतं सुकुमारेषु विरेचयेत्, क्षीररसाभ्यामपि तद्वत्** ( सुसू ४४.७५ )

एरंड तेल. रेचका करिता श्रेष्ठ. गोड, तिखट, तुरट ( अनुरस ) उष्ण. जड, तीक्ष्ण, मधुरपाकी, अग्निदीपन, सूक्ष्म स्रोतसाचे शोधन करणारे, त्वचेला व शुक्राला हितकर, बल्य, योनिशुक्र यांचे दोष हरण करणारे व कफवर्धक. वात, रक्त, गुल्म, हृद्रोग, जीर्णज्वर, आमवात, बस्ति, फासळ्या, इत्यादिकांतील शूळ, सूज, कृमि, कुष्ठनाशक. गृध्रसीवर उपयुक्त. अनुपान–दोषानुरूप दूध, मांसरस, त्रिफळा, कढण, मूत्र, दारू इत्यादी बरोबर द्यावे. गोड, तुरट व कडु रसाबरोबर पित्तनाशक. उदरात तांबड्या एरंडाच्या तेलाचा बस्ती ( अनुवासन ) उपयुक्त.

**–तैलाभ्यास**–पु., **एरण्डतैलस्य विधिपूर्वकं पुनः पुनरुपयोगः, ' एरण्डतैलाभ्यासो वर्ध्मगुल्माऽनिलशूलहराणां श्रेष्ठः '** ( असंसू. १३ )

एरंडतेलाचे सतत सेवन अंडवृद्धि आंत्रवृद्धि, गुल्म, वात, शूलहर, उपायांमध्ये श्रेष्ठ.

**–द्वादशक**–न., क्वाथकल्प०, **एरण्डफलमूलानि गोक्षुरकमूलं शालपर्णी पृश्निपर्णी बृहती कण्टकारिका शृगालविन्ना सहदेवा महासहा क्षुद्रसहा कोकिलाक्षकमूलम् एतेषां क्वाथो यवक्षारयुतः सर्वशूलानां प्रशमनः** ( सुउ. ४२.११२–११५ )

एरंड बी मूळ इत्यादी वरील बारा औषधांचा काढा जवखार युक्त सर्व शूलांचा नाशक. ती औषधे-एरंडमूळ, फळ, गोखरू मूळ, सालवण, पिठवण, रिंगणी, डोरली, दुसरी पिठवण, पेटारी ( बला ) रानउडीद, रानमूग, तालीमखाना.

**–पत्रक्षार**–पु., **एरण्डपत्राणि दग्ध्वा कृतः क्षारः, स व्योषतैलगुडान्वितः कासहरः** ( चचि. १८.१७१ )

एरंडाच्या पानांचा क्षार; सुंठ, मिरी, पिंपळी व गूळ तेल याबरोबर दिल्यास खोकला-नाशक.

**–पत्रिका**–स्त्री., दन्ती ( रा. ६.३३९ ) दाती.

**–फला**–स्त्री., दन्ती ( रा. ६.३३९ ) दाती.

**–बस्ति**–पु., बस्तिकल्प०, **एरण्डमूलादिसिद्धेन द्रव्येण दीयते स बस्तिः, अयं दीपनः लेखनीयोऽस्ति जङ्घोरुपादत्रिकपृष्ठशूलं कफावृतं मारुतनिग्रहं च विण्मूत्रवातग्रहणं सशूलमाध्मानाश्मरीशर्कराऽनाहार्शोग्रहणीप्रदोषान् शमयेत्** ( चसि. ३.४२ ) **स कफावृतो मारुतं शमयेत्** ( का० खिल ८.९७–१०३ )

एरंडमूळ इत्यादी द्रव्यांनी सिद्ध केलेला बस्ती दीपन व दोष खरडून काढणारा आहे. कफावृतवात, वातग्रहणी, मूळव्याध, पोटफुगी, मूतखडा इत्यादी नाशक.

**–सिद्धपयस्**–न., सिद्धदुग्धकल्प०, **एरण्डपल्लवे मूले त्वचि वा सिद्धमजापयः सेचनार्थमाश्चोतनार्थं च वाताभिष्यन्दे उपयुज्यते** ( सुउ. ९.११–१२ ) एरंडाची पाने, मुळे, किंवा साल यांनी सिद्ध केलेले बकरीचे दूध. वाताने डोळे आले तर त्यावर सिंचनाकरिता व पाळीत भरण्याकरिता उपयुक्त.

**–सीसक**–पु., **एरण्डस्य काष्ठम्, भर्टित्रे उपयुक्तम्** ( चसू. २६.८४ )

एरंडाची काडी. मांस भाजण्याकरिता सळई म्हणून उपयुक्त.

**एरण्डादितैल**–न., सिद्धतैल० **विसर्पश्वेतकुष्ठहरम्** ( र. २०.२–४; )

एक सिद्ध तेल. धावरे व कोड नाशक.

**एर्वारु–क**–न., वल्लीफल० ( सुचि. ३१.५ )

हिं.—ककडी.
म.—काकडी, वाळुक, काकडी.
गु.—काकडी.
बं.—काँकड, वडकाँकड.
फा.—खियाजर्डे, खियाताजर.

**ग्रीष्मकर्कटी** ( सुचि. १८.२९ ) **ग्रीष्मकर्कटिका बीजानीषत्सैन्धवयुक्तानि तोयेन पिबेत्, तन्मूत्रजो-दावर्तघ्नम्** ( सुउ. ५५.२७ ) **एतद्बीजकल्कः ससैन्धवः सकाञ्जिको मूत्रकृच्छ्रे पेयः** ( सुउ. ५८.२९ ) **एर्वारुतैलं ग्रीष्मकर्कटिकाबीजाज्जातं तैलम्** ( सुसू. ४५.१२० )

**तद्वातपित्तहरं केश्यं श्लेष्मलं गुरु शीतलम्** ( असंसू. ६.१०९–१० ) **तन्मधुरं मूत्रविसर्जनमग्नि-मांद्यकरं च** ( सुसू. ४५.१३० ) **तृप्तिदम्** ( ध. १.१७६ )

उन्हाळ्यातील काकडीचे बी सैंधवयुक्त पाण्याबरोबर लघ्वीचा वेग अडवण्याच्या खोडीने झालेल्या उदाव-र्तावर उपयुक्त. काकडीच्या **बियांचे तेल**–वातपित्त-नाशक, कफवर्धक. जड, थंड, व केसांना हितकर. लघ्वीची प्रवृत्ति वाढविणारे, तृप्तिकारक, गोड पण अग्निमांद्य करते.

**राजकर्कटी, शाकवर्गीया** ( चसू. २७.११० ) भाजीला उपयुक्त अशी काकडी.



**लोमशा कर्कटी** ( सुचि. ३१.५ ) लव असलेली काकडी. **संपक्वस्य गुणाः—मधुरं, शीतलं, गुरु, रूक्षं, मुख-प्रियं, दाहतृष्णाश्रमार्तिनुत्** ( चसू. २७.११०–१११ ) **मधुरं, सक्षारं, रुच्यं कफवातकृत् नाति-पित्तलम्** ( सुसू. ४६.२१९ )

पिकलेली काकडी—गोड. क्षारयुक्त, थंड, जड, रूक्ष, रुचकर, दाह, तहान, थकव्याचा त्रास नाशक, कफवातकर, थोडे पित्त वाढविणारी.

**–रस**–पु., **कर्कटीरसः** ( सुसू. २२.८ ) काकडीचा रस.

**एल**–न. **सुगन्धिद्रव्य, एला एव** ( सुउ.५७.७ ) वेलदोडा.

**एलवालु–क**–न., **वनस्पति०=एलावालुकं ऐलेयम्** ( असंसू. १२.६८ )

सुगंधी वाळुक, कवठाएवढे सुगंधी खरबूज.

**एला**–स्त्री., **सुगन्धिफल०, सा सूक्ष्मस्थूलभेदाद्द्विधा** ( सुसू. ३८.२४ ) '**एला सूक्ष्मफला वरा**' ( भा.प्र ) **बीजं फलं च तस्या उपयुक्तम्, एलाद्वय एला–युग्म** –( असंसू. १६ ) **गुणाः—तिक्ता, शीता, लघ्वी, सुगन्धा, पित्तकफहरा हृद्रोगबस्तिदोषघ्नी** ( रा. ६.७२ ) **बीजमस्याः वमने उपयुक्तम्।** ( चसू. २.७ ) **शिरोरुजायां प्रदेहे।** ( चसू. ३.२४ ) **श्वासहरगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१६ ( ३७ ) **अंगमर्दप्रशमनगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१७ ( ४४ ) **धूमपानद्रव्ये उपयुक्तं द्रव्यम्** ( चसू ५. २१ ) **व्रणसंशोधनवर्तिकल्कघृततैलेषूपयुज्यते** ( सुसू. ३७.१३ ) **शीतघ्नप्रदेहे** ( चसू. ३.२८ ) **कुष्ठादिरोगहरप्रदेहे** ( चसू. ३.५ ) **शिराव्यधना-नन्तरमप्रवृत्ते रक्ते तत्प्रवर्तनार्थमुपयुक्तद्रव्येष्वेकम्** ( सुसू. ) १४.३५ ) **सक्षौद्रोपदंशव्रणे लेपार्थम्** ( असंउ. ३९ ) **सूक्ष्मैला शिरोविरेचने उपयुक्ता** ( चसू. २.४ ) **अञ्जननामिकायां प्रतिसारणार्थम्** ( सुउ. १४.६ ) **सूक्ष्मैलागुणाः—मधुरा–शीता हृद्या रोचनी दीपनी। मूत्रकृच्छ्रश्वासकासक्षयघ्नी च।** ( ध. २.४४ )

**ताम्बूलद्रव्येषु एकं द्रव्यम्।** ( चसू. ५.७७ ) **अणुतैलद्रव्येषु एकं द्रव्यम्।** ( चसू. ५.६४ ) **स्थूलैला** ( सुक. ६.१४ ) **स्थूलैलाभद्रैलागुणाः—तिक्ता, लघुः, कफवातघ्नी, मुखशोधिनी, मस्तक-शोधिनी, विष–व्रण–बस्तिकण्डुबस्तिरुजाघ्नी।** ( ध. २.४६ )

**स्थूलैला विषघ्नगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.११. ( १६ )

हिं.—इलायची.
म.—वेलची, वेलदोडा.
गु.—एलची कागदी.
बं.—छोटा एलाच.
फा.—हैल. हिल. हाल.
म.—वेलदोडा—लहान व मोठा.

**गुण**—कडवट, थंड, सुगंधी, हलका, कफपित्तनाशक, हृद्रोग व बस्तिगतदोषनाशक. **बीज**—वांतीसाठी उपयोगी. याचे धूम्रपान, डोक्यातून कफस्राव होण्याकरिता उपयुक्त, डोके-दुखी, त्वचेचा थंडावा, कुष्ठादि रोग, उपदंश, रांजणवाडी यावर लेपाकरिता, अंग दुखणे, श्वास व शिरेतून रक्तस्राव नीट होत नसेल तर उपयुक्त. व्रणशोधन द्रव्याची वर्ति करण्यासाठी वापरावयाच्या कल्क, घृत, तैल इ. मध्ये घालावयाचे द्रव्य. लहान वेलदोडा. या खेरीज खोकला, क्षयनाशक, अग्निदीपक आहे. विड्यात उपयुक्त. अणुतेलातील एक द्रव्य. मोठा वेलदोडा. मुखशोधक, विषनाशक, वातघ्न. शिवाय सामान्य गुण. **लहान वेलचीगुण**—मधुर, थंड, हृदयाला हितावह, रुचिकर, दीपन, मूत्र कष्टाने होणे, श्वास, खोकला, क्षय, ह्या विकारात उपयुक्त.

**–गन्धिक**—न., **वनस्पति०=एलावालुकम्** (रा. ४.१३४)
एक वनस्पती. पहा, "एलवालुक"

**–फल**—न., **वनस्पति०=एलावालुकम्** (रा. ४.१३४)
एक वनस्पती. पहा 'एलवालुक'

**–युग्म**—न., **वनस्पति० एलाद्वयम्, स्थूलैला सूक्ष्मैला च** (असंसू. १६.३७)
लहान व मोठा वेलदोडा यांची जोडी.

**एलादिगण**—पु., **एलातगरकुष्ठमांसीध्यामकत्वक्पत्रनागपुष्पप्रियङ्गुहरेणुकाव्याघ्रनखशुक्तिचण्डास्थौणेयकश्रीवेष्टकचोचचोरकवालुकगुग्गुलुसर्जरसतुरुष्ककुन्दुरुकागुरुस्पृक्कोशीरभद्रदारुदारुकुङ्कुमानि पुन्नागकेशरं चेति । गुणाः–एलादिगणो वातकफघ्नः, विषघ्नः, वर्णप्रसादनः, कण्डूपिडकाकोठनाशनश्च** (सुसू. ३८.२४.२५)
वेलदोडा इत्यादी औषधांचा एक गट. हा वातकफनाशक, विषनाशक, वर्ण चांगला करणारा, खाज पुरळ, फोड नाहीसा करतो.

**एलादिगुटिका**—स्त्री., **कल्प०, गुणाः—कास–श्वास–ज्वर–हिक्का–छर्दि–मूर्च्छा–मद–भ्रम–रक्तनिष्ठीवन–पार्श्वशूल–स्वरभेद–क्षयक्षतघ्नी, तर्पणी वृष्या च** (चचि. ११.२१–२४)
वेलची प्रमुख असलेला एक औषधियोग. ही गुटी खोकला, श्वास, ताप, उचकी, ओकारी, मूर्च्छा, माज, भ्रम, थुंकीतून रक्त येणे, फासळ्यातील शूळ, स्वर घोगरा होणे, क्षय आणि उरःक्षताची जखम नाहीशी करते. धातूंना व शुक्राला पोषक आहे.

**एलादिघृत**—न., **सिद्धघृत० गुणाः–घृतमेतच्चक्षुष्यादिबहुगुणवत्तया शोष–पाण्डु–भगन्दर–श्वास–स्वरभेदकास–हृद्रोगेषु पथ्यं विनाऽपि गुणकारि** (सुउ. ४१.५४)
वेलची इत्यादी द्रव्यांनी सिद्ध असे तूप. हे तूप डोळे व इतर इंद्रिये यांना फार चांगले. क्षय, पांडुरोग, भगंदर, श्वास, स्वर घोगरा होणे, खोकला, हृद्रोग, प्लीहावृद्धि व ग्रहणीनाशक आहे. हे घेतांना पथ्याची गरज नाही.

**एलावालुक**—न., **वनस्पति०,** (रा. ४.१३५) **कृष्णगन्धिकट्फलसदृशम्** (सुसू. ३८.१४–१५) **वेदनास्थापनगणे एकं द्रव्यम्** (चसू. ४.१८–४७) **शुक्रशोधनगणे** (चसू. ४.१२–२०) **गुणाः–कषायमत्यन्तशीतम्** (ध.) **लघु सुगन्धि** (भाप्र.) **अत्युग्रम्, कुष्ठगन्धिकम्** (डसुउ. ३९.१२६) **कटुकं पाके** (भाप्र.) **रोचनम्, कफवातघ्नम्, 'विषकण्डूव्रणकुष्ठमूर्च्छाज्वरदाहघ्नम्,' 'तृट्कासारुचिहृद्रुक्पित्तास्रमूत्ररोगगुदक्रमिघ्नम्** (भाप्र.)
शुक्रशुद्धी करणाऱ्या व वेदना नाहीशा करणाऱ्या द्रव्यांपैकी एक. अतिशीत, तुरट, लघु, सुगंधी, अतिशय उग्र, कोष्टकोळिंजनाच्या वासाचे, कफवात नाशक, तिखट विपाकाचे, रुचिकर आहे. विष, खाज, व्रण, कुष्ठ, मूर्च्छा, ज्वर, दाह, तहान, खोकला, अरुचि, हृद्रोग, रक्तपित्त, मूत्रविकार व गुदात होणारे क्रमि यांचे नाशक आहे. पहा 'एलवालुक'.

**एलाह्व**—न., **वनस्पति०=एलावालुकम्** (रा. ४.१३४)
कवठा एवढे सुगंधी वाळुक, खरबूज.
पहा 'एलवालुक'

**एलीयक**—पु., **वनस्पति० विडङ्गसमाकारं सुगन्धि द्रव्यम्, एलावालुकम्, कुमार्याः सत्वम्** (र. २१.१८७)
वावडिंगाच्या आकाराचे सुगंधी (कंकोळ ?)
पहा 'एलवालुक' कोरफडीचे सत्व.
(काळा बोळ, एलीया.)

**एलेयकामृतप्राश**–पु., सिद्धौषधि० **अङ्गदाहशिरोदाह-रक्तपित्तशिरोरोगनेत्ररोगकम्पभ्रमान् नाशयति ।** ( र. २१.१९८–२०४ )
चाटून खाण्यासारखे एक तयार औषध. अंगाचा व डोक्याचा दाह रोग, रक्तपित्त, शिरोरोग, डोळ्याचे रोग, कंप, भ्रम, यांचा नाश करिते.

**एल्वालु-क**–वनस्पति०=एलावालुक ( चचि. १५.१६५; ) ( रा. ४.१३३ ) पहा 'एलवालुक'

**एषण**–न., शल्यतन्त्रे उपक्रम० ( चसू. ११.५५ ) **शलाकया गत्यवेक्षणम्** ( चचि. १२.९७ ) **गतिव्रणोत्सङ्गादीनां शल्यादेर्वा गण्डूपदमुखेन शलाकायन्त्रेणान्वेषणम्** ( सुसू. ७.१७ ) **श्लक्ष्ण-करीरादिनिक्षेपेण शलाकाप्रवेशेन वा व्रणस्य मार्ग-विनिश्चयः, षष्ट्युपक्रमेष्वेकः** ( सुचि. १.८ )
सळईने व्रण इत्यादींचा मार्ग तपासणे. शल्यतंत्रातला हा रोग जाणण्याचा एक उपाय. गांडुळाच्या आकाराची शलाका उपयुक्त. ६० चिकित्सा प्रकारांतील एक प्रकार.

**–कर्म**–न., **एषणम्** ( असंसू. ३४.१५ )
सळईने तपासणे.

**एषणी**–स्त्री., शलाकायन्त्र० **एषणार्थमन्वेषणार्थम् वा,** ( सुचि. ३७.११९ ) **तस्याः प्रकाराः–तीक्ष्ण-कण्टकमुखी प्रथमयवपत्रमुखी गण्डूपदाकारमुखी इति त्रयः** ( सुसू. ८.११ ) **यन्त्राध्याये पठिताया एषण्या आकृतिर्गण्डूपदमुखी, प्रमाणं तु यथायोग-परिणाहदैर्घ्यम्, शस्त्रेषु पुनरेषण्याः प्रमाणमष्टाङ्गुल-माकृतिस्तु तीक्ष्णकण्टकयवपत्रमुखी** ( सुसू. ८.४ ) **एषणीमृदुकठिनभेदाद्द्विधा, मृद्वी औद्भिदैरण्डा-दिनालैः कठिना पंचलोहकृता । गम्भीरे मांसले देशे व्रणः लोहशलाकयैष्यः, जेज्जटः** ( चचि. २५. ८१–८२ )
सळई यंत्र. मल, व्रणदोष काढणे व व्रणमार्ग शोधणे याकरिता ( १ ) तीक्ष्ण काटे असलेल्या तोंडाची ( २ ) जवाच्या पहिल्या पानाच्या आकाराचे तोंड असलेली ( ३ ) गांडुळाच्या आकाराचे तोंड असलेली अशी तीन प्रकारची. आणखी दोन प्रकार मृदु व कठीण. मृदु–वेळूचे कोंब, एरंडादिकांच्या काड्यांनी व कठिण–पंचलोहाने ( पंचधातूंची ) बनविलेली.
**शलाकाशस्त्र० सूचीसंस्थाना क्षाराक्तसूत्रप्रतिबद्धा नाडीनां भगन्दरगतीनां च भेदने** ( असंसू. ३४.३१ )
एक सळई शस्त्र. सुईसारखे क्षाराने माखलेल्या सुताने वेष्टिलेले. भगंदर, नाडीव्रणाची नाडी फोडण्याकरिता.

**एष्य**–न., वि., **अष्टविधशस्त्रकर्मस्वेकम्, एषणीयं नाड्यादि** ( सुसू. ५.५ ) **एष्यविषयः–नाड्यः सशल्या उन्मार्गिणश्च व्रणाः** ( सुसू. २५.११ )
एक शस्त्रकर्म. नाडी, भगंदर यातील व्रण रुजून यावा म्हणून करावयाचे कर्म. शल्ययुक्त नाडी व ज्याचा मार्ग वरच्या दिशेने आहे असा व्रण यांत एषणी आवश्यक.

## ऐ

**ऐकध्य**–न., **एकीभावः** ( सुचि. २८.६ )
एक होणे. एक करणे.
**एकधाकरणम्** ( सुचि. ६.१५ )
**एकत्रीकरणम्** ( सुउ. ५८.५४ )
एकत्र, एकत्रीकरण. एकमेकात मिसळून.

**ऐकशफ**–वि., **एकशफस्येदं** ( अहसू. ५.२७ )
एक खूर असलेल्या प्राण्यांचे मूत्र, मळ, दूध, मांस इत्यादी.

**ऐकाहिक**–वि., रोग० विषमज्वर० **अस्मिन्प्रत्यहं नियते काले ज्वर आयाति बहुधा शीतपूर्वम्** ( र. १२.६३ )
**द्रष्टव्यम् 'ज्वर'**
एक प्रकारचा विषमज्वर. दररोज ठराविक वेळी येणारा ताप. हा बहुधा थंडीताप असतो. पहा, ज्वर.

**ऐक्यकारिता**–स्त्री., **समानकार्यत्वम्** ( असंसू. १९.१४ )
समान कार्य करणे. एक कार्य–करणे.

**ऐक्षव**–वि., **इक्षुभवं यथा गुडादिः** ( सुशा. ४.४३–४४ )
उसापासून निर्माण झालेले गूळ, काकवी साखर इत्यादी.

**ऐङ्गुद**–वि., **इङ्गुदस्येदं, यथा काष्ठम्, तत् सूति-कागारार्थमुपयुज्यते** ( चशा. ८.३३ )
हिंगणबेटाचे लाकूड, फळ, फूल, इत्यादी. प्रसूति-गृहाला हे लाकूड उपयोगी.

**ऐङ्गुदीसमिध्**–स्त्री., **इङ्गुदसमित्काष्ठम्** ( चशा. ८.१० )
हिंगणबेटाच्या काटक्यांची समिधा.

**ऐडगज**–वि., **एडगजसम्बन्धि** ( असंसू. १२.९१ )
टाकळ्याचे, टाकळ्यासंबंधी, पान, फूल, शेंग, मूळ इत्यादी.

**–ज–बीज**–न., **एडगजबीजम्** ( असंसू. १२.९१ )
टाकळ्याचे बी.

**ऐणेय**-वि., एणसम्बन्धि यथा चर्मादि ( चसू. ६.२५ ) काळ्या हरणाचे; त्या संबंधी कातडे, खूर, केस, मांस, मळ, मूत्र, दूध इत्यादी.

**ऐतिह्य**-न., **प्रमाण० आप्तोपदेशो वेदादिरागमप्रमाणम्** ( चवि. ८.४१ ) आप्त मानलेल्याचा उपदेश. वेद, स्मृती, मान्य ग्रंथाचे प्रमाण. आधार.
**इतिहासः** ( चवि. ८.४१ ) इतिहास.

**ऐन्दव**-न., **नक्षत्र० मृगशीर्षम्** ( असंउ. ५ पृ. ५५ ) मृग नक्षत्र.

**ऐन्दवी**-स्त्री., **वनस्पति०-बाकुची** (रा. ५.२२७) बांवची.

**ऐन्दुक**-वि., **शाक० इन्दुकस्येदं, निक्षारम् इदं गुरु-विशदं शीतं समभिष्यन्दि** ( चसू. २७.११५ ) इंदुकाचे पानफूल इत्यादी. निक्षार हे या भाजीचे दुसरे नाव. ही जड, मलनाशक, थंड, आर्द्रता उत्पन्न करणारी.

**ऐन्द्र**-वि., **चित्तप्रकृति० शुद्धसत्त्वस्य प्रकारः** ( चशा. ४.३७ ( २ ) सात्विक प्रकृतीचा एक प्रकार. एक मानस प्रकृती.
पु., **वनस्पति०-देवसर्षपकः** ( रा. परि. ९.४२ ) एक वनस्पती. देव मोहरी.

**-जल**-न., **मेघोदकम्, इदं त्वव्यक्तरसम्। अन्तरिक्षात्पतितं सर्वमप्यैन्द्रमेव। प्रधानमेतन्नरेंद्रपेयं च।** ( चसू. २७.१९६ ) मेघाचे पाणी. हे राजाकरिता प्राधान्याने उपयुक्त. निर्दोष, अमृततुल्य.

**-तोय**-न., **आंतरिक्षमुदकम्, तृष्णाशमनार्थमेतत्प्रशस्तम् "अपां क्षयाद्धि तृष्णा संशोष्य नरं प्रणाशयेदाशु। तस्मादैन्द्रं तोयं समधु पिबेत्तद्गुणं वाऽन्यत्॥"** ( चचि. २२.२५ ) पावसाचे पाणी. तहान भागविण्याकरिता उत्कृष्ट. शरिरात पाण्याचा क्षय झाला की तहान शरिराला सुकवून जीव घेईल म्हणून हे पाणी मध घालून प्यावे किंवा या गुणांचे दुसरे प्यावे.

**-रसायन**-न., **रसायनार्थं सिद्धौषधि० एतज्जराव्याधिप्रशमनं, परं स्मृतिमेधाकरं, वातरोगश्वित्रकुष्ठजठरगुल्मप्लीहापुराणविषमज्वरमेधास्मृतिज्ञानहररोगप्रशमनम्** ( चचि. १ ( ३ ) २४-२९ ) वार्धक्य व रोगनाशक एक सिद्ध औषधि. स्मृति धारणाशक्ति वाढविणारे. कोड, कुष्ठ, उदर, गुल्म, प्लीहारोग, जुना विषमज्वर नाशक आहे.

**-व्याधि**-( परिव. ) पु., **इन्द्रियस्य व्याधिः, "मिथ्यातिहीनयोगेभ्यो यो व्याधिरुपजायते। शब्दादीनां स विज्ञेयो व्याधिरैन्द्रियको बुधैः॥"** ( चशा. १.१२८ ) इन्द्रियाचे रोग. इंद्रियांचा त्यांच्या शब्दादि-विषयांशी जो हीन मिथ्या व अतियोग होतो त्यामुळे होणारे रोग.

**ऐन्द्रियक**-वि., **इन्द्रियस्य इदं** ( चशा. १.१२८ ) इंद्रियाचे. इंद्रियासंबंधी.

**ऐन्द्रियकत्व**-न., **इन्द्रियग्राह्यत्वम्** ( चवि. ८.३२ ) इंद्रियांनी ग्राह्य होण्यासारखे इंद्रियांनी ग्रहण करण्यासारखे,

**ऐन्द्री**-स्त्री., **वनस्पति०-इन्द्रवारुणी** ( चसू. ३.२७ ) कवंडळ, इंद्रावण.
**मत्स्याक्षकभेदः** ( ड. सुउ. ६२.३० ) सोमलता प्रकार; दूर्वाप्रकार. गोरक्षकर्कटी,
**महाकषायवर्गे बल्यगणे एकं द्रव्यं** ( चसू. ४.१७ ( ७ ) चिभडे.
**एला, सूक्ष्मैला** ( रा. ६.६८ )
**भद्रैला स्थूलैला** ( रा. ६.७० ) ( असंसू. १.५५८ )
**इन्द्राणी** ( असंउ. १ ( पृ. ३ ) लहान वेलची. मोठी वेलची, वेलदोडा.
**एलाद्वयम्** (चचि. २९.९४) दोन्ही प्रकारचे वेलदोडे.

**ऐरण्ड**-वि., **एरण्डस्येदम्** ( अहृसू. ६.१६९ ) एरंडाचे पान, फळ, मूळ, तेल इत्यादी.
**-ज-तैल**-न., **ऐरण्डतैलम्** ( सुसू. ४८.३ ) एरंडाचे तेल.

**ऐरण्डाद्युत्कारिका**-स्त्री. **उपनाहयोग० वातार्बुदे उपयुक्ता** ( असंउ. ३५ ( पृ. २६२ ) एरंडीच्या तेलांचे मोहन व इतर वनस्पती कणकेत घालून केलेली हारोळी.

**ऐरावणी**-स्त्री., **वनस्पति० ऐरावतम्** ( असंसू. १४ ) मुसुंबे.

**ऐरावतक**-पु., न.. **वनस्पति० अम्लातकं नारङ्गं वा** ( चसू. २७.१६१ ) मुसुंबे.
**फल०, नारङ्गम्** ( सुउ. १२.४२ )
**जम्बीरम्** ( सुसू. ४६.१६२ )
**'ऐरावणिको, ऐरवणिका कृष्णलोहिताऽल्पफला'** ( ड. सुसू. ४६.१९१ ) मुसुंबे, लिंबू, ईडलिंबू.

**ऐरावतिक**-पु., **नारङ्गः** (ध. ५.२०) मुसुंबे, लिंबू (गोड.)

**ऐरावती**-स्त्री., **वनस्पति० नागबला** ( सुचि. ३८.८५ ) एक वनस्पती-एक बलाप्रकार.

वटपत्री ( रा. ५.२११ ) पाषाणभेद.

**ऐरिण**–न., पार्थिवद्रव्य०–उद्भिदलवर्णं सैन्धवम् ( रा. ६.४० ) सैंधव.

**ऐर्वारु**–पु., वनस्पति० कर्कटी० बालैर्वारुगुणाः–पित्तहरं शीतं च (असंसू. ७.१३५–१३६) थंड व पित्तहर.

**ऐलेय**–न., वनस्पति०–एलावालुक, अरुण ( अहृसू. १५.२६ ) ( र. २१.१९८ )
पहा 'एलवालुक.' सुगंधी कवठाएवढे वालुक. खरबूज.

**–तैल**–न., सिद्धतैल०, पित्तरोगे प्रशस्यते ( र. २१.१९० )
एक सिद्ध तेल. पित्तरोगावर उपयुक्त.

**–सर्पिस्**–न., सिद्धघृत० पित्तविकारनाशकं शिरोभ्रमवातादिविकारनुत् ( र. २१.१८७–८८ )
एक सिद्ध तूप. पित्तविकार, डोकेदुखी, भ्रम, वात इत्यादी विकारनाशक.

**ऐलेयक**–न., वनस्पति–एलावालुक ( र. २१.१९८ )
पहा 'एलवालुक' सुगंधी वालुक.

**ऐश्वर**–वि., ईश्वरकृतमीश्वरसंबन्धि वा योगप्रभावादुत्पन्नैश्वर्यकृतम् ऐश्वरं बलम्; "आवेशश्चेतसो ज्ञानमर्थानां छन्दतः क्रिया । दृष्टिः श्रोत्रं स्मृतिः कान्तिरिष्टतश्चाप्यदर्शनम् ॥ इत्यष्टविधमाख्यातं योगिनां बलमैश्वरम् । शुद्धसत्वसमाधानात्तत्सर्वमुपजायते ॥" ( चशा. १.१४१ )
ईश्वराने केलेले. ईश्वरसंबंधी. योगसिद्धीने प्राप्त होणारे बळ. दुसऱ्याच्या शरिरात किंवा मनात प्रवेश करणे. दुसऱ्याच्या मनातील समजणे, किंवा भूत-भविष्य जाणणे. इच्छेला वाटेल ते निर्माण करणे, इंद्रियांना जे समजत नाही ते समजणे. सर्वांना ऐकायला न येणारे ऐकणे, सृष्टीतील सर्व तत्वांचे स्मरण होणे, अत्यंत तेजस्वी कांति असणे, स्वतः एकदम नाहीसे होणे ह्या सिद्धांचे सामर्थ्यदर्शक आठ गोष्टी आहेत.

**ऐश्वर्य**–न., वैभवम् ( चशा. ४.३७ (३) वैभव.
योगजनितसिद्धी० ( चशा. ३.९ )
योगाने उत्पन्न झालेली सिद्धी.

**अष्टगुणैश्वर्य**–न., अष्टविधमैश्वर्यम्, 'अणिमा लघिमा प्राप्तिः प्राकाम्यं महिमा तथा । ईशित्वं च वशित्वं च तथा कामावसायिता ॥' एतदष्टगुणमैश्वर्यं योगलभ्यमपि सोमरसायनाल्लभ्यते ( ड. सुचि. २९.१३ )
स्वतः अगदी सूक्ष्म होता येणे, अगदी हलके होता येणे, फार मोठे होता येणे. इच्छेप्रमाणे घडविता येणे. हवे ते मिळविता येणे, इच्छेप्रमाणे घडणे. प्रभुत्व आणि कोणाला वश करता येणे हे अष्टगुणैश्वर्य होय. हे ऐश्वर्य योगामुळे प्राप्त होणारे असले तरी ते सोमरसायनाने प्राप्त होते.

**ऐहिक**–न., इहलोकभवम् ( सुसू. १.४ )
ह्या लोकातले, येथले, येथे जन्मलेले.

**ओक**–पु., अभ्यासः, औचित्यम् ( चवि. १.३२ )
अभ्यास, सराव. शीलन, सतत करणे, उचितत्व.

**ओकस्**–न., औचित्यम्, अभ्यासः ( चसू. ६.४ )
स्थानम् ( १३.९ ) ठिकाण.

**–सात्म्य**–न., अभ्याससात्म्यम् ( चवि. १.२२ )
औचित्यादभ्यासाद्यदुपशेते ( चसू. ६.४९ )
क्रमाने सतत सेवन केल्याने जे आत्मसात् होते ते.

**ओघ**–पु., समूहः ( असंसू. ४ ) समूह.

**ओं–कार**–पु., 'ओम्' शब्दः, ओम् इति उच्चारणम्।
मंगलशब्दः ( असंशा. १२.८ )
ओम् हा शब्द. 'ओम्' असे उच्चारणे. मंगलवाचक शब्द.

**ओजस्**–न., शारीर० ओजस्तु हृदयस्थमपि व्यापि ( असहृ. ११.३७ )
सर्वधातुसाररूपम् ( चचि. १५.३ ) सर्वधातूनां परं तेजः ओजः ( असंसू. १९ ) शरीररसस्नेहः ( असंसू. १९ ) सप्तधातुस्नेहः ( सुसू. ६.१५ ) स्वरूपम्–सोमात्मकम् ( अहृसू. ११ ) मधुरं शीतं स्निग्धं स्थिरं श्लक्ष्णं गुरु मृदु बहलं पिच्छिलं प्रसन्नमिति दशगुणमोजः ( चचि. २४.३१ ) शुद्धं रक्तमीषत्सपीतकं शुक्लं च ( सुसू. १५.२३ ) सरं विविक्तं मृत्स्नम् ( सुसू. २१ ) सर्पिर्वर्णि लाजगन्धि ( चसू. १७.७५ ) ओजः शुक्रस्य मलः ( अहृशा. ३.६४ ) ओजः शुक्रस्योपधातुः ( शार्ङ्ग. पू. ५ )
ओजःसारं काश्यपसंहितायामुल्लिखितमस्ति ( कासू. २८ )
द्विविधमोजः परमपरं च । अर्धाञ्जलिप्रमाणं श्लैष्मिकम परम् ओजः ( चशा. ७.१५ ) अल्पप्रमाणं तु परं, यदभिप्रेत्योक्तं 'हृदि तिष्ठति यच्छुद्धं रक्तमीषत्सपीतकम्' इति ( चसू. १७.७४ ) तत्रान्तरेऽप्युक्तं प्राणाश्रयस्यौजस अष्टौ बिन्दवो हृदयश्रिता इति ( चक्रः ) अर्धाञ्जलिपरिमितस्यौजसो धमन्यो

हृदयाश्रिता एव । प्रमेहेऽर्धाञ्जलिपरिमितमेवौजः क्षीयते नाष्टबिन्दुकम् । ओजसा प्रीणिताः सर्वदेहिनो वर्तयन्ति, तदृते सर्वभूतानां जीवितं नावतिष्ठते ( चसू. ३०.९ )

ओजो देहस्थितिनिबन्धनम् । देहसंश्रया विविधा भावा ओजसो निष्पद्यन्ते । ओजसि तिष्ठति सति पुरुषो तिष्ठति ( अहसू. ११.३७-३८ )

ओजःक्षय-अभिघातक्षुधादिभ्य ओजः संक्षीयते ( सुसू. १५.२४-२५ ) ओजःक्षये दुर्बलः पुरुषोऽभीक्ष्णं बिभेति, व्यथितेन्द्रियो दुश्छायो दुर्मना रूक्षः क्षामः सन् ध्यायति ( चसू. १७.७३ ) ओजसः विस्रंसो व्यापत्क्षय इति लिङ्गानि व्यापन्नस्य भवन्ति संधिविश्लेषो गात्राणां सदनं दोषच्यवनं क्रियाऽसंनिरोधश्च विस्रंसे, स्तब्धगुरुगात्रता, वातशोफो वर्णभेदो ग्लानिस्तन्द्रा निद्रा च व्यापन्ने, मूर्च्छा मांसक्षयो, मोहः प्रलापो मरणमिति च क्षये ( सुसू. १५.२६-२७ )

प्रभावः शक्तिः, वीर्यम् ( सुचि.९.७१ ) ( सुसू. १८.४४ )

श्लेष्मा, बलम् प्राकृतस्तु बलं श्लेष्मा सचैव ओजः स्मृतः काये.... । ( चसू. १७.११७ )

ओज हृदयस्थ असूनही सर्वशरीरव्यापि आहे; ते सर्व धातुसाररूप, सर्व धातूंचे अत्युत्कृष्ट तेज, शरीररसाचा स्नेह, सप्तधातूंचा स्नेह, स्वरूपाने सोमात्मक, मधुर, शीत, स्निग्ध, स्थिर, बुळबुळीत, गुरु, मृदु, पसरणारे, गुळगुळीत व प्रसन्न असे दहा गुणयुक्त, शुद्ध असे हे ओज तांबूस व पिवळ्या पांढऱ्या रंगाची छटा असलेले, एकीकडून दुसरीकडे जाणारे, इतर सर्वांहून स्वतंत्र, चिकण, तुपाच्या रंगाचे व लाह्यासारखा वास येणारे असते. हा शुक्राचा उपधातु आहे, असे शार्ङ्गधरमत असून ओजसारत्वाचा काश्यपसंहितेत उल्लेख आहे; पर आणि अपर असे २ प्रकारचे ओज असते. कफ स्वरूप अर्धांजलि प्रमाण अपर ओज असते व पर ओज कमी प्रमाणात असते. प्राणाश्रय स्वरूप ओज अष्ट बिंदुप्रमाण हृदयात असते. हृदयाश्रित धमन्या हे अर्ध अंजलिप्रमाण ओजाचे स्थान आहे. प्रमेहात क्षीण होणारे ओज हे अर्धांजलि प्रमाण ओज होय. अष्टबिंदुक ओज नव्हे. ओजाच्या चांगल्या अवस्थेवरच प्राणिमात्र जगतात. त्यावाचून जीवितच अशक्य असते. देहविषयक सर्व निरनिराळे भाव हे ओजापासूनच होतात.

**ओजक्षय**-अभिघात, भूक इ० मुळे ओजाचा क्षय होतो. ओजक्षयाने दुबळा झालेला पुरुष भित्रा बनतो, त्याची इंद्रिये सदा पीडित असतात. शरीर मलूल होते. मनही उद्विग्न होऊन रूक्ष गुण शरिरात वाढून मनुष्य काहीतरी विचारमग्न व खूप क्षीण झालेला दिसतो. सांधे शिथिल होतात. अवयव थकतात. दोष स्थानच्युत होतात, आणि ह्या ओजाच्या स्रावाने प्राण्याच्या हालचालींनाही अडथळा, अवयव ताठणे व जड वाटणे, वातज सूज, शरिराचा वर्ण बदलणे, मूर्च्छा, मांसक्षय, मोह, बडबड आणि शेवटी मरण ही लक्षणे होतात.

**-संख्यात**-वि., **ओजोरूपः** ( चनि. ४.७ )
ओजाच्या रूपाचा.

**-सार**-वि., **ओजःसारयुक्तः** ( कासू. २८ )
ओजाचे सार ( इंद्रिय द्रव्ये )
न., **धातुसारविशेषः** ( कासू. २८ )
धातुसार विशेष.
**'रसरुधिर......ओजांसि पंचेंद्रियद्रव्याणि धातुप्रसादसंज्ञकानि'**
ही पुढची द्रव्ये मागच्याची प्रसादरूप-साररूप द्रव्ये आहाररसाने पोसली जातात; ओजानंतरची त्याची साररूप द्रव्ये पंचेंद्रियपोषक द्रव्ये होत.

**( ओजस् ) कर**-वि., **ओजोजनकम्** ( चसू. ५.९४ )
ओजोत्पादक, ओजस्कर.
ओज निर्माण करणारे.

**( ओजो ) गुण**-पु., **ओजसो गुणः, मद्यगुणेभ्यस्तीक्ष्णोष्णरूक्षादिभ्यो विपरीतगुणमोजः** ( असंनि.६ )
ओजाचा-चे गुण.
तीक्ष्ण, उष्ण, रूक्ष इ० मद्याच्या गुणांच्या विपरीत ओज गुण आहेत.

**-निरोध**-पु., **ओजोनाशः** ( सुउ. ३९.४५ )
ओजाचा नाश,

**-अपहरण**-नि., **ओजसोऽपहारः** ( असंशा. १ )
ओजाचा अपहार; ओजाचा नाश.

**-वर्धन**-( परिव० )-वि., **ओजसो वर्धकं द्रव्यम्; 'मधुरस्निग्धशीतानि लघूनि च हितानि चौजसो वर्धनान्याहुः** ( कासू. २७.१६ )
ओजाचे वर्धन करणारे द्रव्य,
मधुर, स्निग्ध, शीत आणि प्रकृतीला मानवणारी लघु गुणांची द्रव्ये ओजाचे वर्धन करणारी असतात.

**-वहा**-स्त्री., धमनी० ओजो वहति यस्यां यया वा सा धमनी, सा महामूला मता, मूलं च तस्या हृदयम्, तेन मूलेन महता महामूला मता दश। ओजोवहाः शरीरेऽस्मिन् विधम्यन्ते समन्ततः ॥ ( चसू. ३०.८ )

ओज वहन करणारी धमनी.

या धमनीला महामूला धमनी म्हटले असून तिचे मूळ हृदय आहे. ओजोवहन करणाऱ्या दहा धमन्या सर्व शरिरात आपले कार्य करीत असतात.

**-विस्रंस**-पु., रोग० ( असंसू. १९ ) बलविस्रंसः लक्षणम्-'संधिविश्लेषो गात्राणां सदनं दोषच्यवनं क्रियासंनिरोधश्च ( परिव० ) ( सुसू. १५.२४ )

ओजाची स्वस्थानातून च्युति. स्थानातून बाहेर जाणे. अवयवांचे सांधे ढिले होणे. ग्लानि, दोष स्थानापासून भ्रष्ट होणे. शारीर क्रिया अडणे ही लक्षणे ओजोविस्रंसनाने होतात.

**ओजोशन**-वि., ओजोऽष्टबिन्दुकमश्नातीत्योजोशनः ( चक्र. चशा. २.१० )

ये रजनीचरा ओजोभक्षकाः सन्ति न ते शरीरं भक्षयन्ति ( चशा. २.१० )

अष्टबिन्द्वात्मक ओज खाणारे रजनीचर ( भूते ) दुसरे रजनीचर रक्तमांसादि शरीर घटक खातात.

'असृग्वसामांसभुजः सुभीमा, निशाविहाराश्च ( सुउ. ६०.२२ )

रक्त, चरबी, मांस खाणारे महा भयंकर आणि रात्री विहार करणारे.

**ओजस्य**-वि., ओजोजनकम् ( अहृसू. ५.२० )

ओजोजनक, ओजवर्धक.

**ओण्ड्रकाख्या**-स्त्री., वनस्पति०-जपा ( रापरि. १०.३९ ) जास्वंद.

**ओदन**-पु., कृतान्न० भक्तम्। अद्रवाणि सिक्थानि ओदनः ( चसू. १३.२३ ) तस्य लघुगुरुभेदेन वर्णनम्-लघुः-ओदनः सुधौतः, सम्यक्प्रक्षालित-तण्डुलः, विमलः कण्डनाद्धौतत्वेन चापगतावशिष्टः मलः, शुद्धः स्वयमेव धवलस्तण्डुलः ( सुसू. ४६.३४७ )

मनोज्ञः सुरभिः 'सम्यक्पक्वः 'सम्यक्प्रस्रावितमण्ड उष्णो विशुद्धो विभक्तसिक्थः एवंभूत ओदनो लघुर्भवति। तण्डुलान् पञ्चगुणे तोये पचेत् ( ड. सुसू. ४६.३४७ )

गुरुः ओदनः-'अधौतोऽप्रसृतोऽस्विन्नः शीतश्चाप्योदनो गुरुः।' ( सुसू. ४६.३४८ ) ( चसू. २७.२५७-२६० )

'गुरुः क्षीरादि-साधितः' ( अहृसू. ६ ३१. )

द्रव्यान्तरसंयुक्तः ओदनः-'स्नेहैर्मांसैः फलैः कन्दैः विदलाम्लैश्च संयुताः। गुरवो बृंहणा बल्या ये च क्षीरोपसाधिताः॥' ( सुसू. ४६.३४८, ३४९ )

भृष्टतण्डुलजः ओदनः-'लघुः सुगन्धिः कफहा विज्ञेयो भृष्टतण्डुलः।' ( सुसू. ४६.३४८ )

विषवान् ओदनः-'ओदनो विषवान् सान्द्रः यात्यविस्राव्यतामिव। चिरेण पच्यते पक्वो भवेत् पर्युषितोपमः॥ मयूरकण्ठतुल्योष्मा मोहमूर्च्छाप्रसेककृत्। हीयते वर्णगन्धाद्यैः क्लिद्यते चन्द्रिकाचितः॥' ( अहृसू. ७.३४ ) सविषतोयसाधित ओदनः-'ओदनः साधितस्तेन भुक्तमात्रो विदह्यते। विदग्धः पच्यते कृच्छ्रात् पक्वो मूर्च्छाज्वरप्रदः॥ दर्शयेत् सर्वतो नील-पीतलोहितकर्बुरम्। ( असंसू. ८.७५-७६ )

सम्यक्सिद्धौदनः-'ओदनो विशदः सिद्धः सुस्विन्नो निःस्रुतो मृदुः। तण्डुलैः सकलप्रायैरक्षीणैश्चापि पच्यते॥' ( काखि. ४.७० ) तद्विपरीतो असम्यक् सिद्धः॥ 'अस्विन्नत्वम् अवक्लेदस्त्वसाकल्यमनिस्रवः विरसोऽविशदः शीतः' इति।

शिजवलेला भात. पाणी नसलेली शिते. प्रकार दोन. हलका व जड.

**हलका भात**-कांडून धुऊन मळ काढून पांढरा स्वच्छ सुगंधि चांगली पेज काढून व्यवस्थित शिजविलेला शिते मोकळी असलेला भात हलका असतो. पांचपट पाण्यात शिजवावा.

**जड भात**-न धुतलेला 'पेज न काढलेला' नीट न शिजविलेला व थंड भात जड. दूध इत्यादीत शिजविलेला भात ही जड.

**निरनिराळ्या द्रव्यांबरोबर शिजविलेला भात**-तेलतूप इत्यादीबरोबर मांस फळे कंद डाळी आंबट द्रव्यांबरोबर व दुधादिकांबरोबर शिजवलेला भात जड पौष्टिक बलकर होय. **भाजलेल्या तांदळाचा भात**-सुगंधी व कफनाशक होतो.

**विषयुक्त भात**-घट्ट, पेज न काढलेल्या भातासारखा, उशिरा पचणारा, ताजा असून शिळ्यासारखा दिसणारा मोराच्या गळ्यासारखा चमकणारा हिरवा निळा भात होतो. ह्याचा रंग वास इत्यादी

हीन होतात, नष्ट होतात त्याला पाणी सुटते त्यास चमक येते.

**विषारी पाण्यात शिजविलेला भात**–गुण. जेवल्याबरोबर जळजळ, आंबटपणा येऊन कष्टाने पचतो, मूर्च्छा, ताप येतो व सर्वत्र निळे, पिवळे, तांबडे काबरे पाहतो. **चांगला भात**–शिते न तुटलेली मोकळी असलेला, मऊ, वरच्या सारखा चांगल्या स्वरूपाचा. **अनिष्ट भात**–कण्या झालेला, पेज न काढलेला नीट न शिजवलेला ओलसर नसलेला, मोकळी शिते नसलेला ( गचगचीत ) विरस व थंड झालेला भात अनिष्ट.

**ओदनपाकी**–स्त्री., **वनस्पति०, मधुरस्कन्धे द्रव्य०, नीलाझिन्टी** ( चक्र. चवि. ८.१३९ ) निळी कोऱ्हांटी. **नीलभेण्डी** ( चक्र. चचि. ३.२५८ )
एक प्रकारची वनस्पति.
**बाणः जेजटः** ( चचि. ३.२५८ ) शर, दर्भ.

**ओदनाह्वया**–स्त्री., **वनस्पति०, बला** ( ध. १.२८० )
चिकणा.
**महासमङ्गा** ( असंक. ५ ( पृ. १५६ त. प्र. )
मोठी बला. मोठा चिकणा.
**लज्जालुः** ( असंक. ५ ) लाजाळू.

**ओदनिका**–वनस्पति० बला ( ध. १.२८० रा. ४.४३२ )
चिकणा.

**ओष**–पु., **रोग०, चत्वारिंशत्पित्तविकारेष्वेकः** ( चसू. २०.१४ )
**स्वेदारतिमान् ओषः** ( असंसू. २०.१४ )
घाम येऊनही बेचैन करील असा दाह, आग होणे. चाळीस पित्तरोगांपैकी एक.
**लक्षण०, दाहभेद; ईषद्दाहः** ( सुचि. ३७.६७ )
**'पार्श्वस्थितेनेव वह्निना पीडा'** ( चक्र. चसू. २०.१४ )
**'अग्निसामीप्यमिवोपतापः** ( ड. सुनि. ३.९ )
**'एकदेशिको दाहः** ( ड. सुसू. २१.३२ )
एका मर्यादित ठिकाणी विस्तवाचा चटका लागतो आहे असा दाह, आग. विस्तवाची धग. थोडा दाह.

**ओषध**–न., **दीपनादिकं द्रव्यम् 'ओषधं द्रव्यसंयोगं ब्रुवते दीपनादिकम्'** ( काइ. ४ पृ. ८९ )
अग्नि प्रदीप्त करणाऱ्या तसेच इतर कार्यकारी द्रव्यांचा संयोग. दीपक पाचक द्रव्ये.

**ओषधि–धी**–स्त्री., **उद्भिज्ज०, 'फलपाकनिष्ठा ओषधयः'** ( सुसू. १.२९ )
**ओषो नाम रसः अस्यां धीयते इति ओषधिः** ( काखि. ३.२७ )
**'ओषध्यः फलपाकान्ताः'** ( चसू. १.७२ )
**'ओषधीनां परा भूमिः हिमवान्'** ( चचि. १.३८ )
बी, फळे येऊन ती परिपक्व झाल्यानंतर ज्या नाश पावतात अशा वनस्पती, ओस म्हणजे रस जिच्यात धारण केला जातो ती ओषधी. औषधींची श्रेष्ठ भूमी हिमालय.
**द्रव्यम्, 'द्रव्याणि पुनरोषधयः । तास्तु द्विविधा-स्थावरा जङ्गमाश्च ।'** ( सुसू. १.२८ ) **पार्थिवे-ष्वप्योषधिशब्दो वर्तते** । ( ड. सुसू. १.२८ )
द्रव्ये म्हणजे ओषधी. स्थावर, आणि जंगम असे त्यांचे २ प्रकार. पार्थिव द्रव्यांनाही ओषधी हा शब्द लागू आहे.
**–पति**–पु., **चन्द्रमाः** ( सुचि. ३०.३० ) चंद्र.
**–पुष्पगन्ध**–पु., **ओषधीनां पुष्पगन्धः**
औषधींच्या फुलांचा वास.
**विषौषधिपुष्पगन्धः** ( ड. सुउ. ३९.२१ )
विषारी औषधींच्या फुलांचा वास. ( ज्वरकर )

**ओष्ठ**–पु., **शारीर०, आस्यबहिर्वर्ती स्थूलाकारोऽवयवः तत्प्रमाणं चतुरङ्गुलम्** । ( चवि. ८.११९ )
**दन्तच्छदः, षट्पञ्चाशत्प्रत्यङ्गेष्वेकः । ऊर्ध्वाऽधर-भेदाद्द्वावोष्ठौ** ( चशा. ७.११ ) **मुखावयवः** ( सुनि. १६.४ )
ओठ. तोंडाच्या बाहेरचा स्थूल आकाराचा अवयव. ५६ प्रत्यंगापैकी एक. त्याचे प्रमाण चार अंगुळे. दांतांवरचे झाकण. प्रकार २ वरचा व खालचा. तोंडाचा अवयव.
**–कोप**–पु., **रोग० ओष्ठप्रकोपः ओष्ठरोग०** ( असंउ. २५ पृ. ३७५ )
ओठाचा प्रकोप, ओठाचा रोग.
**–चिमिचिमा**–स्त्री., **रोगलक्षण० ओष्ठयोः चिमचिमा-यमानत्वं पिप्पल्यादिस्पर्शादिव** ( चचि. २३.११३ ) **सर्षपलिप्तस्येव दुःखम्** ( हे अहृसू. ७.२१ )
ओठाला मोहरी, पिंपळी इत्याहि लागल्यानंतर जसा त्रास होतो तशी रोगामध्ये होणारी वेदना, त्रास. ( रोगाचे लक्षण )
**–जाड्य**–न. **लक्षण० ओष्ठस्तम्भः** ( हे. अहृसू. ७.२१ )
ओठ ताठरणे. ओठांची हालचाल त्रासदायक होणे.
**–दालन**–न., **रोग लक्षण० ओष्ठस्य गाढविदारणम् द्विधाभूत ओष्ठः** ( सुनि. १६.५ )
ओठाला भेगा पडणे. चिरण्या पडणे. जणु कांही ओठ द्विधा होतात, फुटतात अशी वेदना.

**-पाक**-पु., रोगलक्षण० ओष्ठयोः पाकः (चनि. १.२४)
ओठ पिकणे; ओठ लाल होऊन त्यावर पुरळ येणे, तो फुटणे इ०.

**-पारुष्य**-न., रोगलक्षण० ओष्ठस्य कर्कशता, स्नेहगण्डूषधारणात्तस्य शमो भवति (असंसू. ३.२९)
ओठ रूक्ष, शुष्क, खरखरीत होणे. तोंडात स्नेहाची गुळणी धरल्याने हे लक्षण शमते.

**-पुष्प**-पु., वनस्पति० बन्धूकः (रा. परि. १०.३५)
दुपारी.

**-प्रकोप**-पु., रोग० ओष्ठकोपः ओष्ठरोगः (सुनि. १६.४)
ओठाचा रोग.

**-भेद**-पु., रोग० अशीतिर्वातविकारेष्वेकः, ओष्ठस्य भेदः (चसू. २०.११) (असंसू. २०.१३)
८० वातरोगांपैकी एक. ओठ फुटणे. ओठाला भेगा पडणे.

**-रोग**-पु., रोग० ओष्ठावयवस्य रोगाः; भोजमते अष्टौ ओष्ठयोः रोगाः (मानि) (सुनि. १६.३) वृद्धवाग्भटे तु एकादश (इंदु असंउ. पृ. १७६.२५) तेषां नामानि वातजः पित्तजः कफजः संनिपातजो (त्रिदोषजः) रक्तजो मांसजो मेदोजः क्षतज इति अष्टौ। 'तत्रौष्ठकोपाः वातपित्तश्लेष्मसंनिपातरक्तमांसमेदोऽभिघातनिमित्ताः। (सुनि. १६.४) खण्डौष्ठः ग्रथितौष्ठः जलार्बुदश्च इत्यष्टाङ्गसङ्ग्रहे एकादश उक्ताः (असंउ. २५ पृ. १७५)

वातज ओष्ठरोगः-तल्लक्षणम्-'कर्कशौ परुषौ स्तब्धौ कृष्णौ तीव्ररुगन्वितौ। दाल्येते परिपाल्येते ह्योष्ठौ मारुतकोपतः॥ (सुनि. १६.५)

पित्तजः-लक्षणम्-तीक्ष्णासहत्वं, ओष्ठौ पीतौ नीलौ च, सर्षपाकृतिभिः पिटकाभिश्चितौ बहुक्लेदौ, शीघ्रपाकावोष्ठौ भवतः (सुनि. १६.६) (असंउ. २५)

कफजः-लक्षणम्-कफेन शीतासहौ गुरू शूनौ सवर्णैः पिटकैराचितौ स्यातामोष्ठौ। तथा च कण्डूमन्तौ पिच्छिलौ शीतलाववेदनौ च भवतः। (सुनि. १६.७) (असंउ. २५ पृ. १७५)

संनिपातजः-तल्लक्षणम्-संनिपातादोष्ठौ नानावर्णौ नानावर्णपिटकैराचितौ इति (अहउ. २१.६) दुर्गन्धास्रावपिच्छिलौ सहसैव म्लानौ कदाचित्संशूनौ सरुजौ विषमपाकिनौ वा (सुनि. १६.८) (असंउ. २५)

रक्तजः-तल्लक्षणम्-ओष्ठौ रक्तवर्णौ भूत्वा शोणितं स्रवतः। तथा स्रावाद्रक्ते क्षीणे खर्जूरसदृशमर्बुदं भवेत्। अत्र ओष्ठौ खर्जूरफलवर्णाभिः पिडकाभिः समाचितौ भवतः। (असंउ. २५) (सुनि. १६.९)

मांसजः-तल्लक्षणम्-मांसाद्दुष्टान्मांसपिण्डोपमावोष्ठौ क्रमाच्च तयोः कृमयः भवन्ति। ओष्ठौ गुरू स्थूलौ च स्याताम्। सृक्वस्योभयतो जन्तवो मूर्च्छन्ति। (सुनि. १६.१०) (असंउ. २५)

मेदोजः-तल्लक्षणम्-मेदसा दुष्टेनौष्ठौ तैलाभौ श्वयथुक्लेदवन्तौ कण्डूयुक्तौ मृदू च भवतः। स्फटिकसंकाशमच्छमास्रावं कुरुतः गुरू च भवतः। (सुनि. १६.११) (असंउ. २५)

क्षतजः-तल्लक्षणम्-क्षतजावसकृदवदीर्येते परिपाल्येते च। ग्रथितौ च पुनरोष्ठौ स्यातां सकण्डूकौ च (सुनि. १६.१२ असंउ. २५) क्षतेन कुपितावोष्ठावसकृदवदीर्येते पाल्येते च। पुनस्तथाप्यचिकित्सिते सति कण्डूयुक्तौ स्याताम् तौ ग्रथितौ (इन्दु) (असंउ. २५ पृ. १७६)

खण्डौष्ठलक्षणम्-'य ओष्ठो वातेन द्विधा कृतो भवति, स रोगो नाम्ना खण्डौष्ठः' (असंउ. २५;)

जलार्बुदलक्षणम्-वातकफाद्धेतोर्जलार्बुदवज्जलार्बुदमोष्ठे भवति (असंउ. २५ पृ. १७६)

चिकित्सा—वातजे ओष्ठरोगे नाडीस्वेदमभ्यञ्जनं साल्वणं चोपनाहनं वातहरतैलं नस्यार्थं हितम्। पित्तरक्ताभिघातोत्थमोष्ठरोगं जलौकाभिरुपाचरेत् पित्तविद्रधिवच्चापि क्रियां कुर्यात्। कफजे रक्ते हृते शिरोविरेचनं धूमः स्वेदः कवलश्च योज्यः। मेदोजे स्वेदिते भिन्ने शोधिते ज्वलनो हितः। एतदोष्ठप्रकोपाणां साध्यानां कर्म कीर्तितम् (सुचि. २२.३-१०;)

खण्डौष्ठचिकित्सा-'स्निग्धस्विन्नस्य खण्डौष्ठस्यौष्ठान्तौ विलिख्य सुश्लिष्टौ क्षौमसूत्रेण सीव्येत्। शतधौतघृताभ्यक्तां चास्मै कवलिकां व्रणस्योपरि दद्यात्। प्रक्लिन्नं च व्रणं व्रणचिकित्सया साधयेत्। तथा वातहरमधुरौषधसिद्धं तैलं नस्यम्।' (असंउ. २६ पृ. १८४)

जलार्बुदचिकित्सा-'जलार्बुदं भित्त्वा त्रिकटुकटुकातेजोवतीयवक्षारसर्जिकासैन्धवकासीसचूर्णैः सक्षौद्रैः प्रतिसारयेत्। अवगाढमतिवृद्धं वा क्षारेणाऽग्निना वा दहेत्। (असंउ. २६ (पृ. १८५)

**ओठाचे रोग**-आठ रोग-तिन्ही दोषांचे तीन, संनिपातज एक, रक्त मांस व मेदाचे तीन, आघाताचा (क्षताचा) एक. तुटका ओठ, गाठाळलेला ओठ, व

जलार्बुद असे ३ प्रकार अष्टांगसंग्रहात अधिक आहेत. **वातजात** काळसर खरखरीत ओठ व तीव्र वेदना, फुटणे फाटणे इ०; **पित्तजात**–निळेपिवळे ओठ, मोहरी सारख्या पुळ्या, स्राव, लवकर पिकणे इ० **कफजात** जडपणा, सूज, खाज, त्वचेच्या रंगाच्या पुळ्या बुळबुळीतपणा इत्यादी; **संनिपातजात**–अनेक रंगाचे ओठ, पुळ्या अनेक रंगाच्या. दुर्गंधी, बुळबुळीत स्राव, वेदना, सूज इत्यादी लक्षणे होतात. **रक्तजात**–ओठ लाल, रक्ताचा स्राव, स्रावाने रक्त क्षीण झाल्यावर खजुरीसारखे अर्बुद होते, यात ओठावर खजुरीसारख्या रंगाच्या पुळ्या असतात. **मांसजात**–मांसाच्या दुष्टीने मांसपिंडासारखे ओठ होतात, त्यात क्रमशः कृमिही होतात; ओठ जड व स्थूल होतात, ओठाच्या दोन्ही कोपऱ्यात जंतु होतात. **मेदाच्या विकारात**–ओठ तेलासारखे, सूज, स्फटिकासारखा स्वच्छ स्राव व खाजयुक्त मऊ व जड असतात. **क्षतजात** एकदम ओठ फुटतात, चिरण्या पडतात, उपचार, केला नाही तर खाज व गाठाळ होतात. **खंडौष्ठ**–वाताने ओठाचे दोन भाग होतात, **जलार्बुद** वातकफाने पाण्याच्या बुडबुड्यासारखे होते. **उपचार वातजात**–नळीने वाफ सोडून शेकणे, अभ्यंग करणे, वातहर तेल नाकात घालणे. साल्वण नावाच्या पोटिसाने शेकावे. **पित्तरक्त व आघातजन्य रोगात**–जळवा लावणे व पित्त-विद्रधीसारखे उपचार करणे. **कफजात**–रक्तस्राव, डोक्याचे रेचक, धूमपान, शेक व गुळण्या उपयुक्त. **मेदोजात**–शेक करून कापावा; स्राव गेल्यावर डाग द्यावा. साध्य विकारात ही चिकित्सा करावी. **खंडौष्ठ**–स्निग्ध करून शेकून ओठाच्या तुकड्याच्या कडा खरडून नीट एकमेकाशी जुळवून रेशमाच्या धाग्याने शिवाव्या. शतधौत घृताने कापसाची घडी माखून त्यावर ठेवावी, व्रण क्लेदयुक्त असेल तर व्रण-नाशक चिकित्सा करावी; वातहारक गोड द्रव्यांनी सिद्ध केलेले तेल नाकात घालावे. **जलार्बुद**–फोडून त्यावर सुंठ, मिरी, पिंपळी, कुटकी, मालकांगोणी, जवखार, राळ, सैंधव, हिराकस यांचे चूर्ण मधाने युक्त चोळावे. हे खोल किंवा फार वाढलेले असेल तर क्षाराने वा अग्नीने जाळावे.

**–स्फुटन**–न., लक्षण०, **ओष्ठस्य विदारणम्, स्नेहगण्डूषधारणात् तस्य शमः** ( असंसू. ३.८ )
ओठ फुटणे. स्नेहाच्या गुळण्या धरल्याने हे शमते.

**ओष्ठोपमफला**–स्त्री., वनस्पति०, **बिम्बी** (ध. १.२०२)
तोंडली.

**ओस**–पु., **रसः** ( काखिल. ३.२७ )
रस, वनस्पतीमधील रस.

## औ

**औकुल**–वि., ओकुलः **काण्डस्थमपक्कं भृष्टम् सस्यम्, ओकुलस्य इदम्; काण्डस्थानि अपक्वानि भृष्टानि गोधूमादिसस्यानि** ( असंसू. १०.६६ )
गव्हाची ओंबी, लोंबी, हुरडा ( ज्वारी, बाजरी इत्यादिकांचा. ) घाटे, उळा ( हरबऱ्याचा, वाटाण्याचा ) भाजलेली कणसे, घाटे, लोंब्या, शेंगा इ०.

**औखर**–न., **पार्थिवलवण०, रोमकम्** ( रा. ६.४० )
रोमक नावाचे मीठ.

**औचित्य**–न., **अभ्यासः** ( चसू. ६.४९ )
अभ्यास, पुनःपुन्हा सातत्याने करणे.
**आनुकूल्यम्** ( चचि. ३०.३१५ ) अनुकूलता.

**औडुम्बर**–पु., **कृमि०, शोणितजस्ताम्रवर्णोऽण्वाकारो वृत्तश्चापादश्च, सौक्ष्म्याच्च अदृश्यः** (चवि. ७.११)
एक रक्तज कृमि. तांबड्या अणूच्या सारखा वाटोळा, पाय नसलेला. सूक्ष्म म्हणून अदृश्य.

**औत्तरभक्तिक**–वि., **भुक्तादुत्तरं सेव्यते इति ।** ( चचि. ८.९२ )
जेवणानंतर सेवन करावयाचे ( औषध )

**औत्पातिक**–वि., न.,–**उत्पातसंबन्धि अरिष्टसूचकनिमित्तम्** ( चइ. १२.२५ ) **उत्पातः शुभा शुभसूचको भूतविकारादि, शकुनापशकुनादि ।** ( चइ. १२.२५–३२ )
**औत्पातिकमशुभं लक्षणम्** ( चइ. १.३ )
अरिष्टसूचक, उत्पात. शुभाशुभ शकुन, अपशकुन, भूतबाधा इ० सूचक.
**आकस्मिकम्** (चइ १२.६० )
एकदम; अवचित घडलेले.

**औत्सुक्य**–न., **उत्सुकस्य भावः, विषयोत्कण्ठाऽऽगतोऽभिलाषः** ( अरु. अहसू. १.१ )
**अविचार्य कार्यप्रवृत्तिः** ( हे. अहसू. १.१ )
**उत्सुकता** ( चइ. १२.४७ ) **रतौ सातिशयोऽभिलाषः** ( सुशा. ३.८ )
उत्सुकता; विषयाची अभिलाषा. विचार न करण्याची कार्यप्रवृत्ति, अति संभोगाची अभिलाषा.

चिन्ता, व्यग्रत्वम् ( चसू. १०.२० ) काळजी.

**औदक**-वि., **उदके भवः, जलसंबन्धि** ( सुशा. १.३ ) जलीय, जलाचे. जलसंबंधी.

**-कन्द**-पु., **औदकाः कन्दाः, कसेरु-शालुक-नदीमाषकादयः** ( सुशा. १०.५७ ) पाण्यात होणारे कंद, कमळकंद इत्यादी.

**-पिशित**-न., **मत्स्यादीनामौदकानां प्राणिनां मांसम्, तत्प्रकृतितः गुरु आहारद्रव्यम्** ( चसू. ५.५ ) मासे इत्यादी पाण्यातील प्राण्यांचे मांस. ते मूळचेच पचनास जड असे आहार द्रव्य आहे.

**-भाव**-पु., **उदके भव औदकः, नदीसमुद्रादिषु वसन्तः मत्स्यकूर्मादय औदका भावा इत्युच्यन्ते** ( सुशा. १.३ ) पाण्यात रहाणारे नदी, समुद्रादीमध्ये मासे कासव इत्यादी प्राणी.

**-मज्जा**-स्त्री., **स्ने० मत्स्यादीनां मज्जा, तस्या गुणाः—मधुरा गुर्वी उष्णा वातघ्नी च** ( सुसू. ४५.१३१ ) पाण्यात असणाऱ्या मासे इत्यादी प्राण्यांची मज्जा. **गुण**-गोड, जड, उष्ण. वातनाशक.

**-मांस**-न., **कूर्मादिजलचराणां मांसम्** (चसू. ६.११) **मत्स्यकर्कटकशिशुमारप्रभृतीनां मांसम्** ( सुचि. ५.२२ ) **जलचारिप्राणिजं मांसम्** ( सुसू. १२.२४ ) **औदकमांसं स्नेहनार्थमुपयुक्तम्** ( चसू. १३.९१ ) मासे कासव इत्यादी जलचर प्राण्यांचे मांस. हे स्नेहनासाठी उपयुक्त.

**-वनस्पति**-पु., **कमलकुमुदकल्हारप्रभृतयः** ( सुचि. १६.१०-१४ ) पाण्यात होणाऱ्या कमळ इत्यादी वनस्पती.

**औदनिक**-पु., **उपकार्यभूतः भक्तस्य साधकः, महानसनियुक्तः परिचारकेष्वेकः** ( सुक. १.१७ ) मुख्य स्वयंपाक्याचा सहायक. स्वयंपाक करण्यासाठी नेमलेल्या नोकरांपैकी एक.

**औदरिक**-पु., **अतिभक्षणशीलः, बह्वाशी, घस्मरः, घस्मरत्वमासुरसत्वलक्षणम्** ( सुशा. ४.८९ ) खादाड, अत्याशी हे आसुरसत्व लक्षण आहे.

**औदर्य**-वि., **उदरे भवः इति, उदरस्थ इति** ( चवि. १.२५. ( १ ) उदरातला. उदरात झालेला.

**औदुम्बर**-पु., **शोणितजः कृमि०, औडुम्बरः** ( चसू. १.४ ( ९; ) रक्तज कृमी.

वि., **ताम्रमयम्** ( सुउ. १८.८५ ) तांब्याचा.

वि., **उदुम्बरवृक्षभवम्, उदुम्बरस्येदम्, यथा औदुम्बरं भस्म** ( सुउ. ५०.२० ) उंबराचे. उंबराच्या झाडापासून झालेले, किंवा केलेले. उंबराचे भस्म.

न., कुष्ठ०, **सप्तमहाकुष्ठेष्वेकम्, पित्ताऽधिकतरं कुष्ठम्** ( चचि. ७.२७; ) ( सुनि. ५.८ ) **ताम्राणि ताम्रखररोमराजिभिरवनद्धानि बहलानि बहुबहलपूयरक्तलसीकानि कण्डूक्लेदकोथदाहपाकवन्त्याशुगतिसमुत्थानभेदीनि ससंतापक्रिमीणि पक्वोदुम्बरफलवर्णानि भवन्ति ।** ( चनि. ५.८ ( २ ); ( चचि. ७.१५ ) सात महाकुष्ठांपैकी एक. तांबडे तांबडे, खरखरीत केसांनी व्यापलेले, जाड, पुष्कळ दाट पू रक्त लसयुक्त, खाज, ओलावा, कूज, दाह, पिकणे हे प्रकार लवकर होणारे, पसरणारे, फुटणारे, आग व कृमियुक्त, पिकलेल्या उंबराच्या फळाच्या वर्णासारखे.

**-पात्र**-न., **ताम्रमयं पात्रम्** ( चक्र. चचि. १.५१ ) तांब्याचे भांडे.

**औद्दालक**-वि., मधु०, **कपिलकीटाः स्वल्पा वल्मीकेषु अन्तर्मधु चिन्वन्ति, तत्कीटभवमौद्दालकम् । 'औद्दालकं रुचिकरं स्वर्यं कुष्ठविषाऽपहम्'** ( सुसू. ४५.१३३ ) एक प्रकारचा मध. लहान व पिंगट किडे वारुळात मध साठवतात. हा मध रुचकर; स्वराला चांगला, कुष्ठ व विष नाशक.

**औद्भिद**-वि., **उद्भिद्य पृथिवीं जायते इति औद्भिदम् ।** ( चसू. १.६८ ) लवण०, **उत्कारिकालवणम्** (चक्रचचि. १५.८५) (अहसू. १०.२७) **पञ्चलवणेष्वेकम्' केचिच्छाम्भरिलवणमाहुः** ( चसू. १.८८ ) **भूमिमुद्भिद्योत्पन्नस्य क्षारोदकस्य सूर्यरश्मिभिः वह्निना वा क्वथनाद्यत् लवणम् उत्पद्यते, तत् । गुणाः—लघु तीक्ष्णमुष्णमुत्क्लेदि सूक्ष्मं वाताऽनुलोमनं तिक्तं कटु क्षारं च** ( चसू. २७.३०३ सुसू. ४६.३१९ ) पृथ्वीच्या पोटातून निघालेले, उगवलेले. सांबर लवण. जमिनीतून निघणारे मीठ. जमिनीतून निघणारे खारे पाणी उन्हाने अथवा विस्तवावर आटवून केलेले मीठ. **गुण**—हलके, तीक्ष्ण, उष्ण, दोष ओले करणारे, सूक्ष्म, कडु, तिखट, क्षारयुक्त, वात सरविणारे.

रोमकलवणम् ( ध २.३२ ) द्रष्टव्यं 'रोमक' रोमक लवण.

–द्रव्य–न., द्रव्यभेद०, औद्भिदं वनस्पतिजं द्रव्यम् । औद्भिदं तु वनस्पति–वानस्पत्य–वीरुदौषधिभेदेन चतुर्विधं भवति ।' ( असंसू. १२.४ )
वनस्पतिज द्रव्य. सर्व वनस्पति. प्रकार चार १ फुले न येता फळे येणारी २ फुले येऊन फळे येणारी, ३ वर्षजीवी ( फळे सुकल्यावर मरणारी ) व ४ झाडावर चढणारी.

**औन्मादिक**–वि., उन्मादकारी, बुद्धिभ्रंशहेतुः ( चशा. १.१०५ )
उन्माद उत्पन्न करणारे. बुद्धिभ्रंश करणारे.

**औपत्यक**–पु., ज्वररोग०, उपत्यका पर्वतासन्नभूमिः, तदुद्भवो ज्वर औपत्यकः । ( सुउ. ३९.५७ )
डोंगराळ भागात उत्पन्न होणारा ज्वर, ताप.

**औपद्रविक**–वि., उपद्रवानधिकृत्य प्रवृत्तोऽध्यायः । उत्तरतन्त्रे प्रथमाध्यायस्य नाम ( सुउ. १.१ )
उपद्रव सांगणारा अध्याय. अध्यायाचे नाव.

**औपधिक**–( औदरिक. पाठः )–वि., छद्मपरः ( सुशा. ४.८८ ) छद्मप्रचारी ( चशा. ४.३८(१) ( चशा. ८.२१ ) उपधिर्नाम छद्म, उपधिः यस्य स्वभावः, स औपधिकः, कपटजीवी ( इंदु. असंशा. २.६१ ) दगलबाज. ठग, कपटी.

**औपधेनव**–पु., धन्वन्तरिशिष्येष्वेकः ( सुसू. १.३ )
धन्वन्तरीच्या शिष्यांपैकी एक.
न., शल्यतन्त्र० ( सुसू. ४.९ ) शल्यशास्त्र.

**औपनासिकी**–वि., स्त्री., सिरा०, नासासमीपवर्तिनी ( सुशा. ७.२२ ) नाकाच्या जवळ असणारी. (शीर)

**औपपादुक**–वि., आत्मनः शरीरान्तरसम्बन्धोपपादकम् ( चक्र चशा.३.३ )
आपल्या दुसऱ्या ( जन्माच्या ) शरिराशी संबंध ठेवणारे ( मन ).

**औपम्य**–न., प्रमाण०, उपमानप्रमाणम्, अन्येनाऽन्यस्य सादृश्यमधिकृत्य प्रकाशनम्, यथा दण्डेन दण्डकस्य ( चवि. ८.४२ )
ज्ञानाची जी प्रत्यक्षादि प्रमाणे त्यांपैकी एक प्रमाण. उपमान. दुसऱ्याशी सादृश्य दाखवून द्रव्याची कल्पना देणे.

**औपसर्गिक**–वि., व्याधि०, उपद्रवसंज्ञः, यः पूर्वोत्पन्नं व्याधिं जघन्यकालजातो व्याधिरुपसृजति, स तन्मूल एव उपद्रवसंज्ञः ( सुसू. ३५.१८ ) पु., एक रोग झाल्यावर त्यामुळे दुसरा रोग उत्पन्न होतो तो. उपद्रव.

–रोग–पु., उपसर्गजो रोगः यो ज्वरादिरोगपीडितजनसंपर्काद्भवति स उपसर्गजो रोगः, उपसर्गाज्जात औपसर्गिकः । औपसर्गिका रोगाः शीतलादयः(ड) 'कुष्ठं ज्वरश्च शोषश्च नेत्राभिष्यन्द एव च । औपसर्गिकरोगाश्च संक्रामन्ति नरान्नरम् ॥' ( सुनि. ५.३४ ) कारणानि अस्य– गात्रसंस्पर्शनिःश्वाससहभोजनशय्यासनवस्त्रमाल्यानुलेपनादीनि । ( सुनि. ५.३४ )
एका रोग्याच्या संपर्काने दुसऱ्याला होणारा तोच रोग. देवी, कांजण्या, ज्वर, कुष्ठ, क्षय, डोळे येणे इत्यादी रोग. रोग्याच्या संपर्कात असणाऱ्या मनुष्याला होतात. ते औपसर्गिक रोग होत.

**औपाधिक**–पु., 'औपाधिक' उपाधिराश्रयः तत्सम्बन्धवानौपाधिकः; द्र० ( र. ११.१७–१९ ) औपधिक. आश्रयसंबंधी. आश्रयी. पहा 'औपधिक'

–दोष–पु., परिव० रसदोष०, कञ्चुकशब्दवाच्यास्ते च सप्त ( र. ११.१७–१९ )
पाऱ्याचे दोष, कंचुका ( सात )

**और**भ्र–पु., धन्वन्तरिशिष्येष्वेकः ( सुसू. १.३ )
धन्वंतरीच्या शिष्यांपैकी एक.
न., शल्यतन्त्रेष्वेकं तन्त्रम् ( सुसू. ४.९ )
शल्यशास्त्रावरील ग्रंथांपैकी एक ग्रंथ.
वि., उरभ्रसम्बन्धि, मेषसम्बन्धि (चसू. १३.८३) मेंढ्यासंबंधी, मेंढ्याचे.

–पयस्–न., मेषीदुग्धम्, आविकं पयः(ध. ६.१६९) मेंढीचे दूध.

–मांस–न., मेषमांसम्, तद् बृंहणं गुरु पित्तश्लेष्मावहं च ( सुसू. ४६.८८ )
मेंढीचे मांस पुष्टिकारक, जड, पित्तकफवर्धक.

–रस–( परिव० )–पु. उरभ्रः प्राणि० तस्य मांसरसः ( चसू. १३.८३ ) मेंढ्याच्या मांसाचा रस.

**और्णिक**–वि., ऊर्णाकृतवस्त्र०, ऊर्णिकासमुद्भवम् । 'ऊर्णा मेषादिलोम्नि' ( अमर ) कम्बलः नानाविधः ( सुउ. ३९.२७५ )
लोकरीचे. कांबळे, रग. इत्यादी वस्त्रे.

–पट्ट–पु., आविकपट्टः, स अनग्निस्वेदसाधनः ( सुचि. ४.१७ )
मेंढ्याच्या कातड्याचे वस्त्र. पट्टा. याने गुंडाळलेल्या शरिराला व शरिराच्या अवयवाला घाम येतो. अग्निवाचून घाम आणण्याचे एक साधन.

**-वस्त्र**-न॰, मेषादिलोमजातं वस्त्रम्; सामान्यवातोपक्रमेष्वेकः ( सुचि. ४.२५ )
लोकरीचे कापड. वातविकारावर उपयुक्त.

**और्व**-वि., पार्थिवद्रव्य०, उर्वी पृथ्वी तद्भवम् उद्भिदम्, लवणम् ( ध. २.३२ ) जमिनीतून निघालेले मीठ.

**-लवण**-न., उद्भिज्जलवणम्, सैन्धवादिलवणषट्कम् ( र. २३.४४ )
जमिनीतून निघालेले सैंधव इत्यादी ६ प्रकारचे मीठ.

**औला**-स्त्री., ग्रहमातृ० ( असंउ. ४.५४२ ) एक ग्रहमाता.

**औलुकी**-वि., स्त्री., उलूकस्य अयं उलूक्या वा इति। उलूकीवसा, धुलूकीवसा ( असंसू. ६.११३ )
घुबडाच्या मांसाचा स्नेह. चरबी.

**औशनस्**-पु.,अगद०, उशनसा शुक्रेण कथितः ( असंउ. ४०.३२० )
एक विषनाशक योग. हा शुक्राने सांगितलेला आहे.
वि.,-तन्त्र०, उशना नामा ऋषिस्तत्कृतं तन्त्रमौशनसम् ( चवि. ८.५४ )
एक शास्त्र. शास्त्रग्रंथ. उशना नावाच्या ऋषीने केलेला ग्रंथ.

**औषध**-न., भेषजम् ( चसू. १.२४ ) ( सुसू. १.३८)
चिकित्सितम् ( चचि. १.३ )
यथा दोषाणामौषधं बस्त्यादि ( अहृसू.१.२५ )
औषध. जसे वातादिकांचे बस्ति इत्यादी औषध.
वनस्पति०, शुण्ठी ( सुचि. २३.१२ ) सुंठ.
न., चिकित्साद्रव्यम् ( चसू. १.७१ ) यदुपकरणायोपकल्पते भिषजो धातुसाम्याभिनिवृत्तौ प्रयतमानस्य विशेषतश्चोपायान्तेभ्यः ( चवि ८.८७ )
औषधिद्रव्यज्ञानोपायः-रूपाऽवबोधो वनगोचरेभ्यः ( असंसू. १२.१०१ ) गोपालतापसव्याधवनचारिमूलाऽऽहारेभ्यो भेषजव्यक्तिर्भवति (सुसू. ३६.१०)
देशभेदेन गुणभेदः हैमवतमौषधं सौम्यं पथ्यं च। वैन्ध्यं भेषजमाग्नेयम् ( असंक. ८ ) प्रशस्तौषधभूमिः-तत्र देशे साधारणे जाङ्गले वा यथाकालं शिशिरातपपवनसलिलसेविते समे शुचौ प्रदक्षिणोदके श्मशानचैत्यदेवयजनागारसभाश्वभ्रारामवल्मीकोषरविरहिते कुशरोहिषास्तीर्णे स्निग्धकृष्णमधुरमृत्तिके सुवर्णवर्णमधुरमृत्तिके वा मृदावफालकृष्टेऽनुपहतेऽन्यैर्बलवत्तरैर्द्रुमैरौषधानि जातानि प्रशस्यन्ते ( चक. १.९ )
ग्रहणकालः—वर्षावसन्तयोर्भैषजानामचिरप्ररूढं शाखापलाशं ग्राह्यम्। ग्रीष्मे शिशिरे वा मूलानि ग्राह्याणि। शरदि त्वक्कन्दक्षीराणि। हेमन्ते साराणि यथर्तुफलपुष्पाणि च ग्राह्याणि ( असंक८ त. प्र. पृ. १६७ )

औषधस्य विविधपरीक्षा विषयाः-योग्यमपि चौषधमेवं परीक्षेत-इदमेवं रसवीर्यविपाकमेवं गुणमेवं द्रव्यमेवं कर्मैवं प्रभावमस्मिन्देशे जातमस्मिन्नृतावेवं गृहीतमेवं निहितमेवं निषिद्धमेवं उपसंस्कृतमेवं संयुक्तमनया मात्रयैवंविधस्य काल एतावन्तं दोषमपकर्षत्युपशमयति वा। तथा तेनाऽनेन वा विशेषेण प्रयुक्तमिदमकरोत् ( असंसू. २३.८ )
कल्पभेदाः-चूर्ण-शीतकषाय-स्वरस-अभिषव-आसुतक्रिया-फाण्ट-कल्क-क्वाथ भेदेनौषधकल्पः सप्तधा ( काखिल. ३.३३-३५ )

पञ्चविधस्तु भेषजानां कषायः ( कल्पः ) निर्यासः, कल्कः, निर्यूहः, शीतः, फाण्टश्च। ( असंसू. ८ )
नृपतेरौषधयोजना-यन्मात्रावद्योजितं पाके लघु हृद्यं दोषप्रशमनमल्पया मात्रयाऽपि कार्यकरं प्रबलवीर्यं प्रसादकरं बलरक्षकमल्पदोषकरमग्लानिकरं संस्कारगुण-सम्पन्नं तदुपयुक्तम् ( काखिल. ३.३१-३३ )

अनन्यकार्योऽवहितो मन्त्रिगुरुसम्मतं सर्वगुणसंस्कारसम्पन्नमौषधमास्वादितपूर्वं परिचरैः स्वयमनुप्रयोजयेत् ( असंसू. २३.३३-३५ ) भेषजसम्पत्-सुभूमौ जातं काले चोद्धृतं कालेनोत्पन्नमविकार्यग्नितोयजन्तुविण्मूत्रजरादिभिरनुपहतं तत्तद्रोगयोग्यं क्रमेण च विधिवदुपपादितम् ( कासू. २६.५ )

औषधविधिः—द्विविधमौषधमूर्जस्करं रोगघ्नं च 'स्वस्थस्यौर्जस्करं किञ्चित्किञ्चिदार्तस्य रोगनुत् ( चचि. १.४ )

'उभयमपि चोभयात्मकम्। बाहुल्येन तु निर्देशः तत्रोर्जस्करं द्विविधं रसायनं वाजीकरणं च। रोगघ्नमपि द्विविधम्—रोगस्य प्रशमनमपुनर्भवकरं च। ( असंसू. १२.३ )

पुनश्च द्विविधम् द्रव्यमद्रव्यं च। तत्र द्रव्यं त्रिविधम्—भौममौद्भिदं जङ्गममिति। अद्रव्यं पुनरुपवासानिलातपच्छायामन्त्रसान्त्वदानभयोत्रासक्षोभणहर्षणभर्त्सनस्वप्नजागरणसंवाहनादि। ( असंसू.१२.४ )

तत्पुनर्द्विविधम्-व्यपाश्रयभेदाद्दैवयुक्तिव्यपाश्रयं चेति। ( चवि. ८.८७ ) ( असंसू. १२.५ )

त्रिविधमौषधम्–दैवव्यपाश्रयं युक्तिव्यपाश्रयं सत्वावजयश्च। तत्र दैवव्यपाश्रयं मन्त्रौषधिमणिमङ्गलबल्युपहारहोमनियमप्रायश्चित्तोपवासस्वस्त्ययनप्रणिपातगमनादि। युक्तिव्यपाश्रयमाहारौषधयोजनादि। सत्वावजयः पुनरहितान्मनोनिग्रहः।
(असंसू. १२.५)

पुनरपि च त्रिविधम्–अपकर्षणं प्रकृतिविघातनं निदानत्यागश्च। ते पुनरपकर्षणादयो द्विविधा बाह्याऽभ्यन्तरभेदेन। तत्र बाह्यमपकर्षणं ग्रन्थ्यर्बुदोपपक्ष्मकृमिशल्यादिषु शस्त्रहस्तयन्त्रादिभिः। अभ्यन्तरं पुनर्वमनविरेचनादिभिः। प्रकृतिविघातनं संशमनम्। तद्बाह्यमभ्यङ्गस्वेदप्रदेहपरिषेकोन्मर्दनाद्यम्। अभ्यन्तरं यदन्तरमनुप्रविश्याऽविक्षोभयद्दोषाञ्छमयति। निदानत्यागो यथादोषं शीतोष्णासनव्यायामादीनां वर्जनं स्निग्धरूक्षाद्यभ्यवहारश्च। तत्र शस्त्रादिसाध्ये भेषजमनुक्रमते न तु भेषजसाध्ये शस्त्रादि।' (असंसू. १२.६)

पुनरपि त्रिविधम्–हेतुविपरीतं व्याधिविपरीतमुभयार्थकारि च। तत्र हेतुविपरीतं गुरुस्निग्धशीतादिजे व्याधौ लघुरूक्षोष्णादि तथेतरस्मिन्नितरत्। व्याधिविपरीतं द्वौ मूलोपक्रमौ तौ च स्नेहस्वेदौ लङ्घनबृंहणे पञ्चकर्माणि वमनादीनि सधूपधूमाञ्जनादीनि च। तथा विम्लापनोपनाहनपाटनादीनि। उभयार्थकारि पुनर्दैवव्यपाश्रयमौषधम्। तथा छर्द्यां छर्दनमतीसारेऽनुलोमनं मदात्यये मद्यपानं तुच्छदग्धेऽग्निप्रतपनं पित्तेऽन्तर्गूढे विमार्गगे वा स्वेदः कट्वम्ललवणतीक्ष्णोष्णाभ्यवहारश्च बहिःप्रवर्तनाय स्वमार्गाऽऽपादनाय च। श्लेष्मणि चान्तर्निगूढे स्तब्धे बहिःशीतोपचारस्तत्पीडितस्योष्मणोऽन्तःप्रवेशेन कफविलयनायेति। एवंविधं ह्यविपरीतमेव सद्भेषजं हेतुव्याधिविपरीतमर्थं करोति (असंसू. १२.७–९)

पचनकालः–त्रिभिर्यामैर्मध्यमाग्नेर्भेषजस्य पाकः (ड. सुचि. ३३.३६) जीर्यत्काललक्षणम्–जृम्भाशब्दद्वेषमुखशोषाऽरतिक्लमतन्द्रा उद्वेष्टनं हस्तपादानाम्, आलस्यं चेत्येतानि जीर्यति भेषजे लिङ्गानि भवन्ति
(काखिल. ३.६९)

सावशेषौषधलक्षणम्–क्लमो दाहोऽङ्गसदनं भ्रमो मूर्च्छा शिरोरुजाऽरतिर्बलहानिश्चेत्येतानि सावशेषौषधलक्षणानि। (चसि. ६.२७)

जीर्णौषधलक्षणम्–अनिलोऽनुलोमः स्वास्थ्यं क्षुधा तृष्णा बलं प्रसन्नमनस्त्वमिन्द्रियपाटवमुद्गारस्यौषधगन्धादिविरहितत्वमित्येतानि जीर्णौषधलक्षणानि
(चसि. ६.२६)

औषधमात्रा–मात्राया व्यवस्थानं नास्ति। देहदोषबलवयोदेशकालाँश्चाऽऽलोच्य भैषजमवचारयेत् (असंक. ८. त. प्र. पृ. १६८) उत्तरोत्तरासु वयोऽवस्थासूत्तरोत्तरा भेषजमात्राविशेषा भवन्ति, यथा बाल्ये (सुसू. ३५.३०) मात्रावदौषधम् अल्पमात्रत्वे सत्यपि प्रशस्तमहावेगं बहुदोषहरं सुखकरं पाके लघ्वास्वादने सुखकरं प्रसन्नत्वकरं रोगघ्नं व्यापत्तावपीषद्विकारकारि नातिग्लानिकरं गन्धवर्णरसोपेतं यदौषधं तन्मात्रावज्ज्ञेयम्'
(चसि. ६ १५.१६)

अल्पमात्रायाः परिणामः–' तथा बलवति बलवद्व्याध्यातुरेऽल्पबलमल्पं वा भेषजमकिञ्चित्करं भूय एव दोषमुत्क्लिश्य व्याधिमुदीरयेत्।'
(असंसू. २३.७)

औषधप्रमाणम्–बाल्ये औषधमात्रादिविशेषः–जातस्य शिशोः प्रथमे मासि रक्तिकाप्रमाणौषधस्य मात्रा स्यात्। सा च मधुक्षीरसिताघृतैः सहाऽवलेहरूपेण देया। संवत्सरं यावन्मासादूर्ध्वं प्रतिमासमेकैका रक्तिका वर्धयितव्या। वर्षादूर्ध्वं षोडशवर्षपर्यन्तं प्रतिवर्षं माषप्रमाणेन वृद्धिः स्यान्मात्रायाम् आसप्ततेश्च सैव मात्रा स्यात्। वार्धक्ये क्रमेण मात्राया ह्रासः कर्तव्यः (ड. सुसू. ३५.३०) क्षीरपाय–क्षीराज्यालोडितौषधस्याङ्गुलिपर्वद्वयग्रहणसम्मिता मात्रा। क्षीरान्नादाय–कल्कस्य कोलास्थिसम्मिता मात्रा। अन्नादाय–कोलसम्मितौषधमात्रा (सुशा. १०.३८;) 'द्विगुणा ह्यग्रपर्वाङ्गुलिजीवनीयानां। तथा संशमनस्य च।' (काखिल. ३.९०) दीपनीयानां चूर्णानामौषधमात्राऽग्रपर्वाङ्गुलिः (काखिल., ३.८९–९०) ऊर्ध्वभागविरेचने नाम वमने तथा विरेचनेऽर्धाग्रपर्वाङ्गुलिरौषधमात्रा (काखिल., ३. ९१) अष्टमासं यावद्बालाय यथारोगमौषधमौषधस्य चतुर्भागस्नेहमिश्रितं देयम्। अतः परं जलपिष्टमौषधं सघृतं देयम् (काखिल., ३.८६–८७)

व्याधावौषधयोजना–सर्वेषामपि व्याधौ 'यथास्वं निदानविपरीतमौषधमवचारयेत्।' (असंसू. ११.४८) हेतुविपरीतेनौषधेन कृतेनाऽपि न शाम्यति

तदा 'सति त्वनुबन्धे निदानविपरीतमपास्य व्याधि-विपरीतमेव तदर्थकारि वा ।' ( असंसू. ११.४९ )

**मृद्वल्पौषधपानार्हः**–यो दुर्बलोऽल्पदोषयुक्तः पूर्वं शोधितः कृशो यस्य कोष्ठस्वरूपज्ञानं नास्ति तेनाऽल्पमात्रमौषधं पेयम् । तथा तत्राऽल्पमात्रया सौम्यमौषधं वारंवारं पीतं सद्धितकरं भवति ( असंसू. २७.४६–४७ ) स्नेहस्य पानात्पूर्वं मृदु भेषजं देयं ततोऽग्न्युत्तेजनं कोष्ठलघुता च भवति ( असंसू, २५.४५ )

**औषधस्य तीक्ष्णमध्यमृदुता**–यदौषधं जलाग्निकीटै-रसंसृष्टं देशकालगुणानुगतं नवं मात्राधिकं तुल्य-वीर्यैर्द्रव्यैर्भावितं पूर्वं स्नेहस्वेदोपपन्नस्य तीक्ष्णत्वं याति । एतद्विपर्यये मन्दतां प्रतिपद्यते ।

व्याधेस्तीक्ष्णत्वमध्यत्वमृदुत्वानि ज्ञात्वा रुग्णस्य च बलं विचार्य तीक्ष्णमध्यमृदून्यौषधानि प्रयोज्यानि । यदि रुग्णो निर्बलो व्याधिश्च तीक्ष्णस्तदा मृद्वौषधं प्रयोज्यम् ( असंसू. २७.५९–६० )

**आशुशुध्द्यर्थं प्रतिपक्षमौषधम्**–यथास्वलक्षणैः कर्म-भिश्च बुध्द्याऽपि दोषमवगमयेत् । तद्यथा–किमाहारेण कुपितो वायुः किं विहारेण तथा रूक्षेण लघुना शिशिरेण वा साहसेन वेगरोधेन वा भयेन शोकेन वेति । ततश्च प्रतिपक्षमेवौषधं प्रयुज्यमानमाशु सिद्धये सम्पद्यते । तत्र मधुराम्ललवणा रसाः कटु-तिक्तकषायाश्चेतरेतरप्रतिपक्षाः ।' ( असंसू. २३.३ )

**औषधस्य तत्त्वम्** 'उचितो यस्य यो देशस्तज्जं तस्यौषधं हितम् । देशेऽन्यत्राऽपि वसतस्तत्तुल्य-गुणजन्म च ॥' ( असंसू. २३५–३६ )

**औषधाऽगारम्**–औषधसंग्रहस्थानम्, भेषजाऽगारम् ( सुसू. ३६.१६ )

**औषधीनां हस्ते निबन्धनम्**–मन्त्रिता सिद्धौषधिर्हस्ते बध्यते यथा मूषका अजरूहा वा हस्ते बद्धा विषापहा ( असंसू. ८.१११ )

**औषध**–चिकित्सेचे द्रव्य, देशकाल इत्यादिकांखेरीज धातुसाम्य निर्माण करण्याकरिता वैद्य जे उपकरण-साधन वापरतो ते. **औषधींचे ज्ञान होण्याचा उपाय**–रानात संचार करणारे गुराखी, तपस्वी, शिकार करणारे, वनात राहणारे, कंदमुळे खाणारे, यांचेकडून वनस्पती इत्यादींचे स्वरूप कळते. **देशभेदाने गुणभेद**–हिमालयातील औषध सौम्य व पथ्यकर. विंध्याद्रीतील उष्ण असते.

**कार्यकारी औषधांची भूमि**–साधारण किंवा जांगल प्रदेश यामध्ये कालानुरूप थंडी ऊन वायु पाणी यांचा पुरवठा असलेली, सारखी निर्मल व निर्मल पाणी वाहत असलेली दर्भ रोहिष जिच्यात विपुल होतात जिची माती स्निग्ध, गोड, काळी किंवा पिवळी आहे, जी न नांगरलेली पण मऊ आहे, जी मोठ्या झाडांनी विकृत केलेली नाही अशा जमिनीत झालेली औषधि प्रशस्त असते. श्मशान, देवालय, यज्ञभूमि, पार, खाचखळगे, बगीचा, वारुळ व खारी जमीन यांतील औषधी घेऊं नये. **घेण्याचा काळ**–वसंत व वर्षा ऋतूत नुकत्याच फुटलेल्या डहाळ्या व कोवळी पाने घ्यावीत. ग्रीष्म व शिशिरात मुळे; शरदात साल कंद व दूध; व हेमंतात नार ( गाभा ) घ्यावा. ज्या ऋतूत फळे फुले येतात त्या ऋतूत ती घ्यावीत.

**औषधाची परीक्षा अशी करावी**–हे औषध ह्या ह्या रस, वीर्य, विपाक, गुण, कर्म, प्रभावाचे आहे, ह्या देशात, ह्या ऋतूत उत्पन्न झालेले अशा प्रकाराने आणले व त्याचा अशा तऱ्हेने संग्रह केला, ह्या कारणास्तव टाकून दिले, ह्याच्यावर असे असे संस्कार केले, ह्या द्रव्याशी ते मिश्र केले, इतक्या प्रमाणात ते दिले, ते अशा काळात दिले की ह्या ह्या दोषांना घालवते किंवा शमवते आणि अशा विशिष्ट तऱ्हेने त्याची योजना केली तर त्याचा असा परिणाम होतो. ( कितीही योग्य औषध आहे म्हणून कळले तरी त्याची इतकी माहिती मिळवून नंतरच ते उपयोगात आणावे. )

**निरनिराळे कल्प**–चूर्ण, थंड पाण्यात चूर्ण भिजवून गाळलेले पाणी, अंगरस, कांजी ( अभिषव ) आसव ( आसुतक्रिया ) चहासारखा उकळत्या पाण्यात घालून गाळलेला काढा ( फांट ) चटणी ( कल्क ) असे सात प्रकार.

**एक मत**–निर्यास ( वनस्पतीचा गोंद ) कल्क ( वनस्पती वाटलेला गोळा ) निर्यूह ( काढा ) ४. चूर्ण थंड पाण्यात रात्री भिजवून सकाळी गाळून घेतलेले पाणी ( शीत ) व फांट म्हणजे वनस्पती चहासारखी उकळून घेतलेले पाणी.

**राजाकरितां औषधाची योजना**–जे योग्य मात्रेने दिले असता पचनाला हलके, हृदयाला हितकर (चवदार) दोषनाशक, थोड्या मात्रेनेही कार्य करणारे, प्रबल वीर्याचे पण बलरक्षक, प्रसन्नता उत्पन्न करणारे, ग्लानि न आणणारे, थोडे दोष

करणारे असले तरी संस्काराने गुणसंपन्न औषध योग्य होय. वैद्याने सर्वगुण व संस्कारसंपन्न औषध गुरूच्या व मंत्र्यांच्या संमतीने इतर कामे बाजूस सारून सावधान चित्ताने प्रथम राजाच्या सेवकांना स्वादाकरितां देऊन व स्वतःही चाखून नंतर राजाला द्यावे.

**औषधाचे गुणकारित्व**–चांगल्या जमिनीत झालेले, योग्य वेळी काढलेले, योग्य वेळात तयार झालेले, अविकारी, आग, पाणी, जंतु, विष्ठा, मूत्र, जुने होऊन न बिघडलेले, त्या त्या रोगाला योग्य क्रमाने योग्य रीतीने दिलेले औषध उत्तम गुणाचे होते.

**औषधाचे प्रकार**–दोन आहेत. शरिरातील धातु-घटक विशुद्धतर बनविणारे म्हणजे ऊर्जस्कर व दुसरे रोगनाशक. दोन्ही प्रकारची औषधे दोन्ही कार्ये करतात. जे कार्य अधिकत्वाने करते त्याला अनुसरून ते त्या प्रकारचे समजले जाते. ऊर्जस्कर दोन प्रकारचे; शुक्रधातु परिपोषक होऊन मैथुनशक्ति वाढवणारे ( वाजीकर ) व सर्व धातुपरिपोषक. म्हणजे रसायन. रोगघ्नही दोन प्रकारचे; रोग शमविणारे व तो पुन्हां उत्पन्न होऊ न देणारे. आणखी दोन प्रकार–द्रव्यात्मक व अद्रव्यात्मक. द्रव्य तीन प्रकारचे पार्थिव, जमिनीतून वर येणारे (औद्भिद) प्राणिज (जांगम). आणि अद्रव्यात्मक प्रकार–उपवास, वायुसेवन, ऊन्ह, सावली, मंत्र, धीर देणे, बलिदान, भीति दाखवणे, त्रासविणे, राग आणणे, हसविणे, झिडकारणे, झोप आणणे, झोप न घेऊ देणे, आंग चेपणे इ. याचे पुन्हां २ भेद–१ दैवव्यपाश्रय व २ युक्तिव्यपाश्रय; अन्य मते औषधाचे ३ प्रकार ैवव्यपाश्रय, युक्तिव्यपाश्रय, व सत्वावजय.

**"य**–मंत्र, औषधी, रत्ने, पुण्याहवाचन बलिदान, उपहार, होम, नियम, स, नमस्कार, तीर्थयात्रादिगमन.

**[illegible]**–पथ्याहार आणि औषधयोजना.

**[illegible]**–अहितकर गोष्टीपासून मनाला दूर [illegible] ( संयम ).

पुनश्च तीन प्रकार–अपकर्षण, प्रकृति विघातन, व निदान त्याग. ह्या अपकर्षणाचे बाह्यापकर्षण व आभ्यंतर अपकर्षण असे २ भेद होतात.

**बाह्यापकर्षण**–ग्रंथी, अर्बुद, उपपक्ष्म ( पडकेस ), कृमि, शल्य, इ. शस्त्र, यंत्र किंवा हाताने काढून टाकणे.

**आभ्यंतरापकर्षण**–वमन विरेचनादींच्या साह्याने दोषांना घालवणे.

**प्रकृतिविघातन**–म्हणजे शमन. हे बाह्यतः अभ्यंग, स्वेद, प्रदेह, परिषेक, उन्मर्दनादि प्रकारचे आणि जे आत जाऊन दोषांचा क्षोभ न करता शमन करते ते अंतःशमन.

**निदानत्याग**–दोषवृद्धीस कारण झालेल्या शीत उष्ण, आळस, ( बसून राहाणे ), व्यायाम इ. वर्ज्य करून स्निग्ध किंवा रूक्ष सेवन करणे. शस्त्रादींनी साध्य विकारात औषध उपयोगात येऊ शकते पण औषधसाध्य विकारात शस्त्र उपयुक्त होत नाही.

पुनश्च ३ प्रकार—१ हेतुविपरीत २ व्याधिविपरीत ३ उभयार्थकारी.

**१ हेतुविपरीत**–गुरु, स्निग्ध, शीत इ. मुळे झालेल्या विकारावर लघु, रूक्ष, उष्णादि याचप्रमाणे इतरत्रही त्या त्या कारणाचे उलट उपचार करणे.

**२ व्याधिविपरीत**–मूलतः दोन प्रकारची चिकित्सा (१) स्नेह स्वेद, लंघन-बृंहण, वमनादि पंचकर्मे, धूप, धूम, अंजनादी आणि (२) अंगुली वगैरेनी मर्दन करून आतल्याआत सूज इ. जिरवणे, पोटीस बांधणे, चिरणे इ.

**उभयार्थकारी**– पूर्वी सांगितलेले दैवव्यपाश्रय उपचाररूप औषध करणे. त्याचप्रमाणे-वांतीवर वामक उपचार, अतिसारात अनुलोमक, मदात्ययात मद्यपान, तुच्छदग्ध (होरपळल्यास) झाल्यास अग्निशेक, पित्त खोल शिरले किंवा निरनिराळ्या मार्गात गेले असता घाम आणणे, तिखट, आंबट, लवण, तीक्ष्ण, उष्ण द्रव्य सेवन करून त्याला त्या स्थानातून स्वस्थानी आणण्यासाठी हे उपचार करणे. कफ असाच खूप अंतःप्रविष्ट होऊन थांबला असता बाह्य शीतोपचार करून त्यामुळे बाह्य उष्णतेला आत प्रविष्ट करवून कफाचे विलयन घडवून आणणे असे विपरीत वाटणारे पण हेतु आणि व्याधि दोहींच्या उलट पण रोगनाशक परिणाम घडवून आणणे.

**पचनकाल**–मध्यम अग्नि असलेल्या व्यक्तीचा औषध पचनकाळ तीन प्रहरांचा म्हणजे ९ तासांचा असतो.

**पचन होत असल्या कालाचे चिन्ह**–जांभया येणे, शब्द सहन न होणे, तोंड सुकणे, निरुत्साह, ग्लानी, डोळ्यावर झापड येणे, हातापायात पेटके येणे व आळस ही चिन्हे होतात.

**औषध पचावयाचे राहिल्यास** – थकवा, दाह, आंग गळणे, श्रम, मूर्च्छा, डोकेदुखी, निरुत्साह आणि बलनाश होतो.

**औषध जिरल्याचे लक्षण** – वायूची गति अनुलोम होणे, स्वास्थ्य वाटणे, भूक, तहान, शक्ति, प्रसन्नता, त्या त्या इंद्रियांची कार्यक्षमता, ढेकरामध्ये औषधाचा वगैरे वास न येणे ही लक्षणे होतात.

**औषधाचे प्रमाण**–हे निश्चित नाही. देह, दोष, बल, वय, देश, आणि काल यांचा विचार करुन औषधाचे प्रमाण ठरवावे. वाढत्या वयानुसार औषधाची मात्रा ठरवावी लागते. जसे बालकाला अगदी माफक प्रमाणात औषध द्यावे. त्याचे प्रमाण कमी असूनही ते चांगले शीघ्र कार्यकारी, पुष्कळ दोषनाशक, सुखाने व लौकर पचणारे, स्वादाला चांगले, मनाला प्रसन्नता देणारे, रोगनाशक, झालाच तर अत्यल्प विकार करणारे, ग्लानि न आणणारे, वास, रंग, रस चांगला असलेले, असे मात्रायुक्त समजावे.

**थोड्या प्रमाणाचा परिणाम**–बलवान रोग व बलवान रोग्याला थोड्या प्रमाणात किंवा थोड्या शक्तीचे औषध रोगहारक कार्य न करता दोष खूप प्रमाणात उचंबळवून रोग वाढविते.

**प्रमाण**–जन्मलेल्या बालकाच्या पहिल्या महिन्यात गुंजेएवढे असावे. ते मध दूध खडीसाखर तूप यांबरोबर चाटण स्वरुपाने द्यावे. पुढच्या महिन्यापासून मूल वर्षाचे होईपर्यंत एक एक गुंज वाढवावे. एक वर्षानंतर व सोळा वर्षांपर्यंत एकेक मासा या प्रमाणे वाढवावे, सत्तर वर्षांपर्यंत तेच प्रमाण असावे नंतर ते कमी करावे. दुधावर असलेल्या बालकाला दूध तूप यात मिसळून अंगुळीच्या दोन पेऱ्यांवर मावेल एवढे औषध द्यावे; तर दूध व अन्नावर असलेल्याला बोराच्या आठळी एवढे आणि अन्नावर असणाऱ्याला बोरा एवढे. औषध द्यावे जीवनीय व शामक औषध दोन अंगुळांच्या टोकावर मावणारे म्हणजे पूर्वीच्या औषधाच्या दुप्पट प्रमाण द्यावे.

**दीपक औषधी चूर्ण**–अंगुळीच्या टोकाच्या पेऱ्यावर मावेल इतके देणे. वामक व रेचकाचे प्रमाण वरील प्रमाणाच्या अर्धे. आठ महिन्यापर्यंत मुलास औषधाच्या चौथा हिस्सा स्नेह घालून द्यावे. आठ महिन्यापेक्षा अधिक वयाच्या बालकाला औषध वाटून व तूप मिसळून द्यावे.



**रोगावर योजना**–सर्व रोगावर कारण विपरीत औषध द्यावे. याचा उपयोग झाला नाही व रोग तसाच असला तर रोगाच्या विपरीत द्यावे किंवा कारण समान पण रोगनाशक असे द्यावे.

**मृदु व थोडे औषध देण्यास योग्य**–दुबळा, थोड्या दोषांचा, रेचक इ० पूर्वी देऊन शुद्ध झालेला, किडकिडीत, व ज्याच्या कोठ्याची माहिती नाही त्याला थोड्या प्रमाणात पण वारंवार दिले म्हणजे ते हितकारक होते. स्नेह देण्याच्या अगोदर मृदु औषध द्यावे म्हणजे अग्नि प्रदीप्त होतो व कोठा हलका होतो.

**औषधाची तीक्ष्णमध्यमृदुता**–जे औषध पाणी अग्नि किडे यांमुळे बिघडले नाही, देश, काळ, यांच्या गुणांना अनुरुप, नवे, प्रमाणाने अधिक, समान वीर्याच्या औषधांची भावना दिलेले, असे जर प्रथम स्नेह व शेक दिल्यानंतर दिले तर तीक्ष्ण होते. वरील गोष्टींच्या विपरीत असलेले औषध मृदु असते. रोगाचे तीक्ष्णत्व मध्यत्व सौम्यत्व पाहून रोग्याचे बल लक्षात घेऊन तीव्र, मध्य, किंवा सौम्य औषध द्यावे. जर रोगी दुबळा व रोग तीव्र असेल तर औषध मृदु द्यावे. शरिराची शुद्धि शीघ्र करावयाची असेल तर विपरीत गुणाचे औषध उपयुक्त होते; लक्षणांनी व कर्मांनी तसेच बुद्धीने दोष जाणावेत. जसे वायूचा प्रकोप आहाराने किंवा विहाराने झाला? रुक्ष हलके किंवा थंड यापैकी कशाने? साहस, मल मूत्रविसर्जनाचे वगैरे वेग अडविणे, भय, शोक, यांनी वात प्रकुपित झाला की काय हे जाणून नंतर विपरीत गुणकर्मांचे औषध द्यावे म्हणजे ताबडतोब शमन होते, गोड आंबट खारट तिखट कडु तुरट रस हे परस्परांचे प्रतिपक्षी रस आहेत.

**औषधाचे तत्व**—जो देश ज्या दोषाच्या प्रकृतीच्या किंवा रोगाच्या विपरीत गुणाचा असल्या मुळे व्यक्तीला उचित असतो तेथे उत्पन्न झालेले वनस्पतिज किंवा प्राणिज औषध त्याला हितावह होते. तोच मनुष्य अन्य म्हणजे अनुचित देशात गेल्यास तेथे उचित देशाच्या गुणाचे आणि तेथेच निर्माण झालेले वनस्पतिज किंवा प्राणिज औषध त्याला हितकर होते.

औषधे संग्रह करण्याच्या स्थानाला 'भेषजागार' म्हणतात.

**हाताला औषध बांधणे**–मंतरलेली सिद्धौषधि हातात, गळयात, कमरेला वगैरे बांधली जाते; जसे मोखा किंवा अजरुहा हातावर बांधली तर ती विष-नाशक होते.

**–कर्म**–न., **औषधकार्यम्, यथा ऊर्ध्वाधोभागोभय-भागसंशोधनादि** ( सुसू. ४०.५ )
औषधाचे कर्म म्हणजे कार्य–वामक औषधाने वांती होणे; रेचकाने रेच होणे इत्यादी.

**–काल**–पु., **औषधप्रदानकालः, 'न हि अप्राप्ताऽतीत-कालमौषधं यौगिकं भवति ।'** ( असंसू. २३.१२ )
औषध देण्याची वेळ. योग्य वेळ आली नसतां किंवा वेळ टळल्यावर दिलेले औषध कार्यकर होत नाही.
**दश औषधसेवनकालाः १ अभक्तं, केवलमौषधं २ प्राग्भक्तं पूर्वभक्तस्य,** (का,) **३ अधोभक्तं अधोभक्तस्य** ( का. ) **४ मध्येभक्तं-मध्येभक्तस्य** (का.) **५ अन्तराभक्तम् भक्तयोः मध्ये** (का.) **६ सभक्तम् भक्तयुक्तं ७ सामुद्गम् भुक्तस्यादावन्ते** (का.) **८ मुहुर्मुहुः सभक्तमभक्तं वा मुहुर्मुहुः ९ ग्रासम्–ग्रासे संमिश्र्य** ( का. १० ) **१० ग्रासा-न्तरम् ग्रासान्तरे** ( का. ) ( सुउ. ६४.६५ )
( काखि. ३.४४.१३ )
११ '**निशि च**' **इति एकादशधावचारणम्**
( असंसू. २३.१२ )
( १ ) न खाता–रिकामे पोटी ( २ ) जेवणापूर्वी ( ३ ) जेवण होताच ( ४ ) जेवणामध्ये नि जेवण झाल्यावर ( ५ ) दोन जेवणांमधील काळात ( ६ ) अन्नाबरोबर किंवा अन्न शिजताना औषध घालून ते अन्न घेणे. ( ७ ) जेवणाच्या पूर्वी व नंतर लगेच ( ८ ) थोड्या थोड्या वेळाने. ( ९ ) घासात मिस-ळून ( १० ) प्रत्येक घास घेतल्यानंतर. हे दहा औषध घेण्याचे काल झाले आणखी ( ११ ) एक काळ राहिला तो रात्री झोपताना औषध घेण्याचा.

**–गुण**–पु., **औषधमत्र द्रव्यं, तस्य गुणा गुरुमन्दादयः 'बहुकल्पं बहुगुणं सम्पन्नं योग्यमौषधम् ।'**
( असंसू. २ अहृसू. १.२८ )
औषधाचे गुण. उष्ण, थंड, जड, हलके, स्निग्ध, रूक्ष इत्यादी गुण. अनेक गुणांचे व अनेक कल्प ज्याचे होऊ शकतात व जे गुणांनी समृद्ध असते ते औषध होय.

**–ग्राम**–पु., **औषधसमूहः** ( असंसू. २३.१० )
औषधांचा समूह; समुदाय.

**–ज्ञान**–न., **औषधस्य ज्ञानम्, 'तज्ज्ञानं व्याधिज्ञाना-त्सूक्ष्मतरम्**– ( काखिल. ३.१७ )
औषधाचे ज्ञान. हे रोगज्ञानापेक्षाही अधिक सूक्ष्म आहे.

**–पेषक**–पु., **औषधपेषणं करोति यः, परिचारकः** ( चसू. १५.७ ) औषध वाटणारा, कुटणारा.

**–मात्रा**–स्त्री., **औषधस्य मात्रा, भेषजप्रमाणम्** ( सुशा. १०.३८ ) औषधाची मात्रा. प्रमाण.

**–वेग**–पु., **औषधस्य वेगः शक्तिः परिणामो वा**
( चसि. २.१२ )
औषधाचा कार्य करण्याचा वेग. शक्ति. परिणाम.

**–संरम्भ**–पु., **भेषजक्षोभः** ( अहृसू. २३.२८ )
औषधाने झालेला क्षोभ. ( डोळ्यात औषध इ० गेल्याने वा घातल्याने क्षोभ होतो. )

**–सार**–पु., **औषधवीर्यम्** ( सुचि. १.११७ )
औषधाचे वीर्य. कार्यकर्तृत्व. सामर्थ्य.

**–स्तम्भन**–न., **स्तम्भयति इति, स्तब्धता, स्थिरी-करणम्, स्वेदनस्य विपरीतमौषधम्** (असंसू. २६) **'श्लक्ष्णं रूक्षं सूक्ष्मं द्रवं स्थिरं यद्द्रव्यं लघु चोद्दिष्टं प्रायस्तत्स्तम्भनं स्मृतम् ।'** ( चसू. २२.१२ ) **यत् सरं कषायं मधुरं च तिक्तं च तत्प्रायः स्तम्भनम्** ( असंसू. २६ ) **'विषक्षाराग्न्यतीसारच्छर्दिमोहातु-रेषु च...स्तम्भनम् औषधं देयम्'** ( असंसू. २६ )
ओकारी, रेच बंद करणारे (थांबवणारे) औषध. घाम बंद करणारे औषध. चिकण, रूक्ष, सूक्ष्म, पातळ, स्थिर, हलके जे जे ते ते बहुतकरून स्तंभन. जे सारक परंतु तुरट गोड कडु ते बहुतकरून स्तंभक, विष, क्षार, अग्नि, अतिसार, ओकारी विचाराचा गोंधळ होणाऱ्या रोग्यांना स्तंभक द्यावे.

**–स्वेदन**–न., **स्वेदकरमौषधम्, 'द्रवस्थिरसरस्निग्ध-रूक्षसूक्ष्मं च भेषजं स्वेदनम्'** ( असंसू. २६ )
घाम आणणारे औषध.
पातळ, स्थिर, सारक, स्निग्ध, रूक्ष, सूक्ष्म, जड, तीक्ष्ण व उष्ण औषध घाम आणते.

**औषधि–धी**–स्त्री., **वनस्पतिः** ( सुचि. ३०.३ )
**प्रभावयुक्ता वनस्पतिः, यस्या उपयोगेन व्याधिरुप-शाम्यति** ( चनि. ७.१६ )
प्रभावी वनस्पती तिच्याने रोगाचे शमन होते.

**–ग्राम**–पु., **औषधीनां समूहः** ( अहृसू. १८.१६ )
औषधींचा समूह, समुदाय.

**-गतरोग**-पु., रोग० गलरोगः, मुखाऽऽयतने गले भवो रोगः, 'सप्तदश कण्ठे ।' ( सुनि. १६.३ ) ( सुनि. १६.४६ ) कण्ठे अष्टादश ( असंउ २५ पृ. पृ. १८०-८२ )
सुश्रुतमताने गळ्याचे १७ रोग; वाग्भटमताने १८.

**-घ्न**-वि., 'स्वरसादकृत् । (हे) 'कपित्थमामं कण्ठघ्नम् ( अहृसू ६.१२६ )
गळ्याला-स्वराला घातक. घशाला घातक. स्वर विघडविणारे. अकण्ठ्य.

**-जनन**-वि., कण्ठाय हितम्, कण्ठ्यगणः ( असंसू. १५.१४ )
गळ्याला-स्वराला हितकर; कण्ठ्य. घशाला उपकारक गण.

**-तालु**- न,. शारीर० कण्ठस्योर्ध्वतनो भागः ( चशा ८.४१ )
घशाचा वरचा भाग, टाळू.

**-धूम**-पु., लक्षण० कण्ठे धूमोद्गमनमिव ( सुउ. ४७.२१-२२ )
गळ्यातून-घशातून धूर बाहेर पडतो आहे असे वाटणे. धुराची ओकारी होते आहे असे वाटणे.

**-धूमायन**-न., लक्षण० कण्ठे धूमोद्गमनवद् वेदना ( सुउ. ४५.७ )
एक चिन्ह; गळ्यातून-घशातून धूर बाहेर पडत आहे अशी वेदना.

**-ध्वंस**-पु., रोग० अशीतिर्वातविकारेष्वेकः स्वरस्य नाशः ( असंसू. २०.१३ )
८० वातविकारांपैकी एक, स्वरनाश.

**-नाडी**-स्त्री., शारीरावयव० ( सुशा. ६.२७ ) सा मण्डलसन्धिप्रकारेण रचिता, 'कण्ठहृदयनेत्रक्लोमनाडीषु मण्डलाः ।' ( सुशा. ५.२७ )
श्वासमार्ग. मंडलसंधिप्रकाराने झालेली. कंठ, हृदय, डोळा व क्लोम नाडीला गोल ( मंडल ) संधि असतात.
कण्ठनाडीदेशः, स्वरस्थानम् ( सुशा. ५.१९ )
स्वराचे स्थान. ध्वनिस्थान-घशांतील नाडीचा भाग.

**-नाड्यस्थि**-न., अस्थि० कण्ठनाड्यां चत्वार्यस्थीनि तरुणास्थिप्रकाराणि, तत्र मण्डलाश्चाऽस्थिसन्धयः ( सुशा. ५.१९ )
गळ्यांतले हाड. ही चार आहेत, तरुणास्थींपैकी. यांचे सांधे ( मंडलाकृति ) गोल आहेत.

**-पाक**-पु., रोगलक्षण० गलपाकः ( चनि. १.२४ )
गळ्यात होणारा पाक. गळा पिकणे. घसा पिकणे.

**-पीडन**-न., रोगहेतु० गलस्रोतोनिरोधनम्; तत्कृतव्याधिस्वरूपम्-'बाहुरज्जुलतापाशैः कण्ठपीडनाद्वायुः प्रकुपितः श्लेष्माणं कोपयित्वा स्रोतो निरुणद्धि लालास्रावं, फेनाऽऽगमनं संज्ञानाशं चाऽऽपादयति ।' तत्रोपायः-'तमभ्यज्य संस्वेद्य शिरोविरेचनं तस्मै तीक्ष्णं दद्याद्रसं च वातघ्नं विदध्यादिति ।' ( सुसू. २७.२२ )
गळा दाबणे. हात, दोरी इत्यादी पाश घालून दाबणे. यामुळे वायु कफाला दुष्ट करून स्रोतसांना बंद करतो; लाळ गळणे, फेस येणे, संज्ञा नाहीशी होणे ही चिन्हे होतात. उपचार-अभ्यंग करून शेकून नाकातून डोक्याचे तीक्ष्ण रेचक द्यावे व वातघ्न मांसरस द्यावा.

**-भङ्ग**-पु. रोग० = स्वरसादः, ग्रीवाया अविधारणम् ( मानि विषनि ) ( सुक. ३.४०-४१ )
मान न धरवणे. स्वरभंग. ध्वनिभंग. स्वरविकृति. ध्वनिविकृति.

**-रोग**-पु., कण्ठगतरोगः ( असंसू. ६.१८ )
गळ्याचा रोग.

**-विशोधन**-वि., कण्टरोधहरम् ( अहृसू. १०.१६ )
गळ्यातले दोष काढणारे, कंठदोषहरण, कंठ शुद्ध करणारे.

**-वेदना**-स्त्री., लक्षणम्-'पीतमुद्गिरति स्तन्यं, विष्टम्भिश्लेष्म सेवनेन ईषज्ज्वरोऽरुचिर्ग्लानिः कण्ठवेदनयार्दितः-' ( कासू. २५.९ )
रोगांचे एक लक्षण. मुलाच्या घशात वेदना होणे. या बरोबर थोडा ज्वर, अरुचि, ग्लानि, व प्यालेले दूध ओकणे हा त्रास होतो. अवष्टंभक व कफकर सेवनाने होणारा रोग.

**-शल्यावलोकिनी**-वि., यत्र० 'कण्ठाभ्यन्तरशल्याऽवलोकनार्थं दशाङ्गुला नाडी ।' ( अहृसू.२५.१३ )
एक नाडी यंत्र १० अंगुळे लांब; घशात अडकलेले शल्य पहाण्याचे यंत्र.

**-शालूक**-पु., कण्ठगतरोग० लक्षणम्-'कोलाऽस्थिमात्रः कफसम्भवो यो ग्रन्थिर्गले कण्ठशूकभूतः खरः स्थिरः शस्त्रनिपातसाध्यः ( सुनि. १६.५१ )
चिकित्सा-रक्तावसेचनं कार्यम् अशेषच्छेदः कर्तव्यः एककालमल्पशः स्निग्धमन्नं भोक्तव्यम्, प्रतिसार-

णकवलधूमादिविधिर्जलशुण्डीचिकित्सावत्करणीयः
(सुचि. २२.६४-६५)
घशातला एक रोग. कफाने गळ्यात बोराच्या आठळी एवढी गाठ कुसळा सारखी सलते. ती स्थिर खरखरीत असते. **उपचार** रक्त काढावे व समूळ काढून टाकावी. एक वेळ स्निग्ध अन्न थोडे खावे. औषधाचे सारवण, गुळण्या, धूम्रपान इ० जलशुंडी सारखे उपचार करावेत.

**-शुण्डी**-स्त्री., **मुखतालुस्थः अवयव० मुखे जिह्वोपरि स्थिता** (सुनि १६.४१) पडजीभ.
**रोग० कण्ठशुण्डीरोगः लक्षणम्-श्लेष्मासृग्भ्यां तालुमूले प्रवृद्धो दीर्घः शोथो ध्मातबस्तिप्रकाशः तृष्णाकासश्वासकृत्** (मानि मुख रोग) **चिकित्सा-अङ्गुष्ठाङ्गुलिसंदंशेन गलशुण्डिकामाकृष्य मण्डलाग्रेण छेदयेत् त्रिभागम्। अत्यादानात्स्रवेद्रक्तं तन्निमित्तं म्रियेत च। हीनच्छेदाद्भवेच्छोफो लालानिद्राभ्रमस्तमः। तत्र कफनाशनं धूमं कवलं प्रतिसारणं च योजयेत्॥** (सुचि. २२. ४९-५६)
पडजिभेचा एक रोग. पडजीभ सुजणे. मोठी होणे. लांब होणे, कफ रक्ताने टाळूच्या मुळापाशी वाढलेली लांब सूज. फुगलेल्या बस्तीसारखी दिसते, तहान खोकला व श्वास करते. **उपचार** आंगठा व जवळचे बोट यांनी किंवा चिमट्याने पडजीभ ओढून मंडलाग्राने एक तृतीयांश भाग कापावा. अधिक कापली तर रक्तस्राव होईल व त्यामुळे रोगी मरेल. कमी कापली तर सूज वाढेल, लाळ गळेल, झोप, भ्रम, अंधेरी येईल. उपचार-कफनाशक धुरी किंवा धूम्रपान गुळण्या व सारवण योजावे.

**-शोष**-पु., **लक्षण० कण्ठस्य शोषः**
(चनि. १.२१) (चनि. ४.४७)
घशाचा शोष, घसा सुकणे. गळा सुकणे. खूप पाणी प्यावेसे वाटणे.

**-श्वयथु**-पु., **लक्षण० कण्ठस्थानस्थः शोथः**
(कासू. २५.११)
घसा सुजणे, गलशोथ. गळा आतून सुजणे.

**-संशुद्धि**-स्त्री., **कण्ठगतदोषशोधनम्**
(चसू. ५.३७)
घसा मोकळा होणे, घशातील दोषशुद्धि करणे घशातील दोष काढून टाकणे.

**-सिरा**-स्त्री., **शारीरावयव० कण्ठस्थिता अष्टौ मातृकाः सद्यः प्राणहराणि मर्माण्येतानि**
(सुशा. ६.९)
एक अवयव. गळ्यातील शिरा. त्या आठ आहेत. त्यांना मातृका म्हणतात. एकादी तुटली की मनुष्य मरतो. ह्या मातृका सद्यःप्राणहर मर्मेच होत.

**कण्ठक**-पु., **रोग० कण्ठगतो रोगः लक्षणम्-कण्ठके श्वयथुः कण्ठे ज्वरारुचिशिरोरुजः।**
(कासू. २५.११)
गळ्यात सूज, ज्वर, डोकेदुखी इ० लक्षणे होतात. एक रोग.

**कण्ठामय**-पु., **कण्ठरोगः गलगण्डादिः** (अहसू. ६.१४)
घशाचा रोग. गळ्याचा रोग. गलगण्ड इत्यादी रोग.

**कण्ठालङ्कारक**-पु., **वनस्पति० काशः** (रा. ८.२०१)
कसाड गवत, लव्हाळे.

**कण्ठावधमन**-(परिव०) न., **लक्षण० कण्ठे शब्दविशेषः** (चनि. ६.७)
घशात घुमल्यासारखा शब्द. घूँ घूँ, हूँ हूँ शब्द.

**कण्ठिन्**-पु., **वनस्पति० कलायः** (ध. ६.१०३)
वाटाणा.

**कण्ठीरविन्**-पु., **वनस्पति० वासकः आटरूषः**
(रा., ४.२८) अडुळसा.

**कण्ठेगुण**-पु., **अलङ्कार० 'कण्ठावलम्बी'**
(हे. अहसू. १३.५) गळ्यातील दागिना.

**कण्ठोद्ध्वंस**-पु., **रोग० अशीतिर्वातविकारेष्वेकः कण्ठस्योद्ध्वंसः** (चसू. २०.११)
घशात सारखे खोकावे असे वाटते व तसा प्रयत्न करणे, उधरस. घशात खवखवते ते काढण्याचा प्रयत्न करणे. ठसका, ठसकणे, वातरोगापैकी एक रोग,
**रोगलक्षण० कण्ठभङ्गः उद्ध्वंसः उत्कासिका।**
**द्र० कण्ठोद्ध्वंस** (सुउ. ४१.१३ असान. ५.१७)
कण्ठोद्ध्वंस पहा.

**कण्ठोपलेप**-पु., **रोग० विंशतिश्लेष्मविकारेष्वेकः कण्ठस्योपलेपः गौरवशब्दोच्चारणाशक्तिसूचकम्**
(चसू. २०.१७) (असंसू. २०.१५)
एक रोग. घसा लपेटल्या सारखा वाटणे. कफाने लेपटलेसे वाटणे. शब्द उच्चारण्याची असमर्थता सूचक अवस्था.
**लक्षण०** (असंनि. ३.३२) द्र० कण्ठोपलेप

**कण्ठ्य**-वि., **कण्ठाय हितम् स्वर्यम् महाकषायवर्गे एको गणः** (अहसू. ५.१६ चसू. ४.८)
घशाला हितकर, स्वराला हितकर. महाकषाय वर्गात एकगण.

—गण—पु., गण० स्वरहितौषधानाम् गणः 'सारिवेक्षुमूलमधुकपिप्पलीद्राक्षाविदारी कैटर्यहंसपादीबृहती कण्टकारिका इति दशेमानि कण्ठ्यानि भवन्ति ।' (चसू. ४.१० (९) तान्येव कण्ठजननानि स्वर्याणि (असंसू. १५.१४)

घशाला—स्वराला हितकर. वनस्पती गण. अनंतमूळ, उसाचे मूळ, ज्येष्ठमध, पिंपळी, द्राक्षा, भुईकोहळा, कायफळ, राजहंस, डोरली. रिंगणी. ह्या १० औषधांचा कंठ्य गण होतो. पहा 'कण्ठोपलेप'

**कण्डक**—पु., औषधियोग० लेपः (असंउ. ६. पृ. ५८) औषधांचा एक योग. एक लेप.

न. तण्डुलक्षोदनचूर्णम् (असंउ. १ पृ. ५) तांदूळ कांडल्याने झालेले चूर्ण, कण्या.

**कण्डकण्ठ**—पु., वनस्पति० अपामार्गः (रा. ४. ३८७) आघाडा.

**कण्डनी**—स्त्री., कण्डनोपयोगिनी भूमौ काष्ठादिनिर्मिता, इतस्ततश्चालनोपयोगिनी खातरूपा वा, उलूखलम् 'मुसलम्' (र. ७.५–८)

उखळ व मुसळ. उखळी ही इकडे तिकडे नेता येण्यासारखी किंवा जमिनीत खड्डयाच्या स्वरूपाची असते. कुटण्याचा खलबत्ता.

**कण्डरा**—स्त्री., शारीरावयव० महास्नायुः (चसू. ५.६०) स्नाय्वः 'वृत्तास्तु कण्डराः सर्वा विज्ञेयाः' (सुशा. ५.३१) 'स्नाय्वां वृत्तानां महतां कण्डरासंज्ञा' (इन्दु. असंशा. ५.८३) संख्या–षोडश कण्डराः (सुशा. ५.६) चतुर्दश कण्डराः (काशा. पृ.६६) स्थानानि पादहस्तग्रीवापृष्ठाणि । तासां चतस्रः पादयोः—'द्वे द्वे करचरणेषु (असंशा. ५.६१) तावत्यो हस्तग्रीवापृष्ठेषु (सुशा. ५.११) उपधातु० (चचि. १५.१७)

शरिराचा अवयव. मोठे व गोल स्नायू. शरिरात एकंदर सोळा कंडरा आहेत. एक मत चौदा. चार चार याप्रमाणे हातात व पायात मानेत व पाठीत अशा १६ कंडरा उपधातु आहेत.

'कण्डराशब्दः स्नायुवाचकः' (डसुउ. १.१९–२०) 'स्थूलस्नायुः ।' (चक्र. चचि. १५.१७)

जाड स्नायू. कंडरा शब्द स्नायुवाचक आहे.

**कण्डला**—स्त्री., वनस्पति० कपिकच्छूः (ध. १.१५१) खाजकुहिली.

**कण्डीर**—पु., वनस्पति० जीरकः (असंसू. ७.१५७) जिरे.

**कण्डु**—स्त्री., रोग० खर्ज्जूः (चक्र. चसू. अ. २०.१५) खर्जूः (अस. अहृसू. १२.५३) श्लेष्मकृत् लक्षणम् (असंसू. २०.१२०) बाले लक्षणम्—"घर्षत्यङ्गानि शयने। रोदितीच्छति मर्दनं शुष्ककण्ड्वर्दितं विद्यात्ततश्चार्द्रा प्रवर्तते सुखायते मृद्यमानं मृद्यमानं च शूयते । शूनं स्रवति सस्योढामार्द्रायां शूलदाहवत् ॥—" (कासू. २५. ३०–३१) संशोधनयोग्यः विकारः (चसू. १६ १३) एलादिगणः कण्डूनाशनः (अहृसू. १५.४४) चन्दननलदादीनि—दशेमानि कण्डूघ्नानि भवन्ति (चसू. ४.११–१४) कुष्ठाद्युद्वर्तनं कण्डूहरम् (चसू. ३.९)

खाज. रोग. खरूज. खाजवणे प्रथम; नंतर ओलावा होतो, सूज येते, स्राव होतो व चोळल्याने बरे वाटते, ओलाव्यानंतर वेदना व दाह होतो संशोधन योग्य विकार आहे. वामक रेचक देणे योग्य. वेलदोडा इ., चंदन जटामांसी इत्यादी गण कण्डूनाशक पोटात द्यावेत व कोष्ठ इत्यादी उटणे खाजहारक म्हणून देणे.

लक्षण० (चसू. ५.२९) पित्तस्य कर्म (चसू. २०.१५) श्लेष्मणः कर्म, 'कर्माणि तु श्लेष्मणः कण्डूस्थैर्यगौरवोपदेह. . . . . श्वेतवर्णता चेति । (असंसू. २०.२०) स्नानेन शमनीयं लक्षणम् (चसू. ५.९२; अहृसू. २.१६)

पित्ताचे एक लक्षण. कफानेही होते. उटणे व स्नान यांनी हे शमते. खाज, स्थिरता, जडत्व, माखल्यासारखे वाटणे व पांढरेपणा ही कफ चिन्हे.

**कण्डुल**—पु., वनस्पति० कन्दशाकम्, सितसूरणः (रा. ७.५)

एक वनस्पती. कंदाची भाजी. पांढरा सुरण.

**कण्डुला**—स्त्री., वनस्पति० अत्यम्लपर्णी (रापरि. ३.३९) आंबट पानांची वनस्पती.

**कण्डू**—स्त्री., कण्डुः (चसू. १३.३५) खाज.

रेवतीग्रहस्य नाम (काबालग्रहचि. पृ. ९९) रेवती या नावाचा बालग्रह.

**करी**—स्त्री., वनस्पति० कपिकच्छूः (असंसू. १६.३) (अहृसू. १५.९) खाजकुहिली.

कारी कपिकच्छूः

खाजकुहिली.

**–घ्न**–वि., कषायवर्ग० ( चसू ४.८ ) **कण्डूं निघ्नन्ति** ( असंसू. १५.१९ ) **कण्डूघ्नगणः** ( चसू ४.११ )
कंडू नाशक वनस्पतींचा एक गट.
पु., **वनस्पति० आरग्वधः** ( रा. ९.३३३ ) बाहवा.

**–मका**–स्त्री., **कीट० विश्वम्भरभेदः** ( ड. ) **सविषः असौ, ' कण्डूमकाभिर्दष्टे पीताङ्गच्छर्द्यतीसारज्वरादिभिराहन्यते ।–'** ( सुक. ८.३३ ) **चिकित्सा– 'कण्डूयकाभिर्दष्टानां रात्रौ शीताः क्रिया हिताः । दिवा ते नैव सिध्यन्ति सूर्यरश्मिबलार्दिताः ॥–'** ( सुक. ८.५३ )
एक किडा. विश्वंभर जातीच्या किड्यांपैकी एक. हा विषारी असतो. याच्या दंशाने पिवळेपणा ओकारी अतीसार ज्वर होतात मृत्यु येतो. उपचार–रात्री थंड उपचार करावेत. दिवसा सूर्याच्या उष्णतेची भर म्हणून तेव्हा उपचार लागू होत नाहीत.

**कण्डूक**–पु., **रोग० बालस्य गलरोगः, लक्षणम् 'कण्डूके श्वयथुः कण्ठे ज्वरारुचिशिरोरुजः ।–,** ( कासू. २५.११ )
मुलांचा गळ्याचा रोग. घशाची सूज, ताप, अरुचि, डोकेदुखी ही लक्षणे होतात.

**कण्डूति**–स्त्री., **रोगलक्षण कण्डूः** ( र. ३.१०१ ) खाज.

**कण्डूयन**–न., **कण्डूशमनार्थं यद् घर्षणं तत्** ( चशा ८.३२ )
खाजवणे. कंडू कमी होण्याकरिता खडबडीत साधनाने जे घासणे ते.

**कण्डूल**–पु., **वनस्पति० कन्दः सूरणः** ( रा. ७.५ )
सूरण.

**कण्डेर–क**–पु., **वनस्पति० शाक० तण्डुलीयः** ( असंचि. १३ )
तांदुळजा.

**कतक**–पु., न., **वनस्पति० शशकपुरीषप्रतिमं फलम् ' निवळीचे बी ' इति म. भाषायाम्**
**कतकफलम्** ( सुसू. ४५.१७ ) ( धनि. ३.१७२ )
**निर्मलीवृक्षस्य फलम्, तोयप्रसादनं फलम्** ( सुसू. ४२.११ )
**विषघ्नगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.११ ( १६ )
**दृष्टिप्रसादकम्–कतकस्य फलम्** ( काक षट्कल्प. १०.३१ )
**फलगुणाः–कटु तिक्त शीतलमुष्णं** ( रा. ) **चक्षुष्यं रुच्यमम्बुप्रसादनं दृष्टिप्रसादनं** ( का. ) **मूत्रग्रहे उपयुक्तम्** ( काखि. १४४.४५ ) **तृष्णा-विष-नेत्ररोग-शूलकृमि-मूत्रकृच्छ्रशर्कराऽश्मरीहरम्** ( सुचि. ७.७ ) ( ध. ३.१७२ )
**' नेत्रोत्थरोमविध्वंसि विधिनाऽञ्जनयोगतः ।** ( रा. ३.१७३ )
हिं.–नेलमल, नेइमल;
**म.–निर्मली, निवळी.**
त.–टोट्टामारम;
निवळीचे बी. सशाच्या लेंडीसारखे हे दिसते. पाणी स्वच्छ करणे, विषनाशक, दृष्टि साफ करणे या करिता उपयुक्त. **गुण**–तिखट. कडू, थंड, हलके, डोळ्यांस व रुचीला हितकर. मूत्र अडले तर उपयुक्त; तहान, विष, नेत्ररोग, शूल, कृमि, मूतखडा, लघ्वीतली रेव नाशक. अंजन उपयुक्त.

**कतमानिशरीरीय**–पु., **अध्याय०** ( चइ. ६,१ )
एका अध्यायाचे नाव. रोगात निश्चितमरणदर्शक होणारी चिन्हे यात आहेत. चरकसंहिता इंद्रियस्थानांतील सहावा अध्याय.

**कतिधापुरुषीय**–पु., **अध्याय०** ( चशा. १.१ )
शारीराचा पहिला अध्याय. यात पुरुषांचे प्रकार, घटक. जन्म मरण योग, मोक्ष यांचे विवेचन आहे.

**कत्तृण**–न., **तृण० गन्धतृणम्** ( चसू. २.१३ ) **रोहिषतृणम्** ( चसू. ४.१२ ( १७ ) ( सुउ. ५२.१४ ) ( असंचि. १; ) **आस्थापनेऽस्य मूलमुपयुज्यते** ( चसू. २.१३ ) **स्तन्यजननगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१२ ( १७ ) **कासघ्नयोगे एकं द्रव्यम्** ( सुउ. ५२.१४ ) **कफवातज्वरे श्वासघ्नयोगे** ( असंचि. १ ) **गुणाः–कटुतिक्त कषायं** ( भाप्र. ) **कफपित्तघ्नं श्वासकासहृद्रोगविषूचिकाऽजीर्ण–शूलहरं, रक्त दोषघ्नं शस्त्रदोषहरं शल्यदोषहरं बालग्रहघ्नं च.**
हिं.–रोहिष सौन्धिया, गन्धेजवास, रसघास.
म. रोहिष, सुगन्ध रोहिषतृण,
ब.–रामकर्पूर.
फा.–खबालमामून.
रोहिस गवत. याच्या पानापासून सुगंधी तेल निघते; त्यावर पूर्वी अत्तरे काढीत असत. अत्तराचे माध्यम म्हणून उपयोग. शिवाय औषधि उपयोग. शोधक बस्ति, दूध वाढविणारा गण, खोकला नाशक योग. कफवातज्वरातील श्वासनाशक योग यात हे उपयुक्त.

**गूण**–तिखट, कडु, तुरट; कफपित्तनाशक, श्वास; खोकला, हृद्रोग, अजीर्ण, शूल, वांती व अतिसार, रक्त-दोष, शस्त्र व शल्यदोषहारक.

**कथरी**–स्त्री., वनस्पति० **कन्थारी** ( रापरि. ) ( ८.२० )
फणी निवडुंग.

**कथा**–स्त्री., **शास्त्रवार्ता** ( हे. अहसू. ३.२५ )
शास्त्रासंबंधी हकीगत.
**पूर्वपुरुषवृत्तान्त प्रबन्धरचना** ( सुसू १९.८ )
पूर्वींच्या पुरुषाच्या वृत्तांताच्या प्रबंधाची रचना. आयुर्वेद क्षेत्रातील शास्त्राला परिपोषक कर्तृत्वशाली पुरुषांचे निबंध, टीका, संग्रह, संशोधनात्मक विचार व त्यांचे चरित्र यांच्या कथा.

**–श्रवण**–न., ( परिव. ) **उपक्रम० मद्यपानजदाहे तच्छमाय हेमन्त–हिमालयमलयाऽऽदिपर्वतशीताम्भोहरितद्रुमजलाशयचन्द्रइत्येतेषां मनोज्ञाः कथादाहार्तं श्रावयेत्** ( सुउ. ४७.६३ )
कथा वर्णन ऐकणे. दाह होत असेल तर तो कमी व्हावा म्हणून हेमंतऋतु, हिमालय पर्वत, मानस सरोवर, काश्मीर, गोवा यांचे काव्यमय आल्हाद-कारक वर्णन ऐकवणे.

**कदम्ब–क**–पु., वनस्पति० **वृत्तपुष्पः वृक्षः** (ध. ५.१०४)
**प्रावृषि पुष्पितः** ( सुसू. ६.३२ ) ( सुसू. ३८.१४ )
**धाराकदम्बः** ( रा. ९.१७२ ) **वेदनास्थापनगणे** ( चसू. ४.१८ ( ४७ )
**न्यग्रोधादिगणे** ( सुसू. ३८.४८ ) **गुणाः–कषायस्तिक्तः कटुः शीतः व्रणरोपणः शुक्रलस्त्रिदोषघ्नः कासदाहविषघ्नः** ( ध. ५.१०४ )
हिं.–कदम्ब.
**म.–कदम्ब, कळम्ब.**
गु.–कदम्ब.
बं.–कदम.
त.–वेल्लकदम्ब.
कदंब. कळंब. एक वृक्ष. देवताड. शिरस वृक्ष. कळंब पावसाळयात फुलतो. वेदना कमी करणारा व वड इत्यादि गणात आहे **गुण**–तुरट, कडू, तिखट, थंड, व्रणरोपक, शुक्रवर्धक, खोकला, दाह, विषनाशक व त्रिदोषहर.
न., **शाक० गुणाः–विशदं गुरु शीतं समभिष्यन्दि** ( चसू. २७.११४ )
या नावाची भाजी. मोहरीची भाजी. गुण–विशद, गुरु, शीत, कफकर.

**–निर्यात**–पु., **कदम्बो बहुफलस्तस्य निर्यासः शुक्रशोधनगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१२ ( २० )
कळंबाचा काढा. शुक्रशोधन गणातील एक द्रव्य.

**–पुष्पगन्ध**–पु., धान्य० **व्रीहि** ( १६.१०२ )
एक प्रकारचे तांदूळ.

**( कदम्बा )**–स्त्री., वनस्पति० **जीमूतकः देवदालीभेदः देवदाली** ( रा. ३.२४३ ) देवडांगरी.

**–पुष्पा**–स्त्री., वनस्पति० **महाश्रावणिका मुण्डी** ( रा. ५.२१९ )
मुंडी, गोरखमुंडी.

**–पुष्पिका**–स्त्री., वनस्पति० **श्रावणी मुण्डीभेदः मुण्डी** ( ध. १.१६० )
गोरखमुंडीचा प्रकार.

**–पुष्पी**–स्त्री., वनस्पति० **अलम्बुषा, मुण्डकेति लोके** ( ड. ) **इयं श्लीपदरोगे काकादन्यादिपानीयक्षारे प्रयुक्ता** ( सुचि. २९.६३–६५ )
गोरखमुंडी, लाजाळू, मंजिष्ठा. ही हत्तीपाय रोगात गुंज इत्यादींच्या पिण्याच्या क्षारात दिली जाते.
**भूमिकदम्बः** ( डसुउ. ४४.१९ ) **कदम्बभेदः, कदम्बः** ( रा. ५.१७४ )
गोरखमुंडी, मराठी.

**कदम्बक**–पु., वनस्पति० **हरिद्रुः** ( रापरि. ९.२६ )
दारुहळद.
**कदम्बा**, स्त्री., वनस्पति० **जीमूतकः, देवदालीभेदः, देवदाली** ( रा. ३.२४३ )
देवडांगरी.

**कदर**–पु., वनस्पति० **खदिरभेदः, श्वेतखदिरः ( खदिर )** ( रा. १३५ ) ( चसू. २५.४९ ) **खदिराकारः श्वेतसारः** ( डसुसू. ३८.८ ) ( अहसू. १५.१९ )
खैराचा प्रकार, पांढरा खैर.
**विट्खदिरः** ( चक्र. चचि. ३.२५८ ) **खदिरः** ( रा. १.३९ ) **उदर्दप्रशमने** ( चसू. ४.१७ )
शेण्या खैर; उदर्दरोगात उपयुक्त.
पु. न. **रोग० हस्तपादस्थानगतः क्षुद्ररोगः बदरमात्रो ग्रन्थिविशिष्टोऽसौ; लक्षणम्–पादे शर्करादिभिः पीडिते कण्टकादिभिः क्षते वा मेदोरक्तानुगैर्दोषैः कीलवत्कठिनो निम्नमध्योन्नतः कोलमात्रः सरुक्स्रावी ग्रन्थिर्जायते** ( सुनि. १३ ) ( ३०–३१ ) ( असंउ. ३६ पृ. २७२ ) **चिकित्सा–कदरं तु शस्त्रेणोत्कृत्याऽग्नितप्तेन तैलेन दहेत्** ( सुचि. २०.२३ )

बहुधा तळपायाला होणारे कुरूप. पायात काटा इत्यादी शल्य राहिल्याने त्या भोवती घट्ट मांस व त्वचा यांचे जाड आवरण तयार होते तो घट्टा. **लक्षण**–खिळ्यासारखी कठिण, वेदना व स्राव होणारी गाठ होते. कारण–खडा काटा यांनी पायाला व्रण झाला तरं मेद व रक्तदुष्टि होऊन मध्ये खोल व बाजूला उंच गाठ होते. **उपचार**–शस्त्राने उकरून तापलेल्या तेलाने जाळावे.

**कदली**–स्त्री., **प्राणि० मृगभेदः, बिलेशयः 'कदलीहट्ट' इति ख्यातः** ( चसू. २७.३८ ) **महाबिडालसमो व्याघ्राऽऽकारः** ( सुसू. ४६.७८ )
( असंसू. ७.७६–७७)
मोठ्या मांजरासारखा वाघाच्या आकाराचा हिंस्र प्राणी.

**वनस्पति० रम्भा** ( अहसू. १५.२६ ) **अनुपदेशोद्भवो वृक्षः** ( चक. १.८ ) **दीर्घपत्रा गुच्छफला क्षारनिष्कासनार्थमुपयुक्तेषु द्रव्येष्वेका** (सुसू. ११.११) **अस्याः क्षारोऽविमूत्रेण पीतः शर्करारोगनाशकः** ( सुचि. ७.२२ ) **फलानि बालपक्वभेदेन द्विधोपयुज्यन्ते बालं फलं विशेषेण कषायम्, फलगुणाः– मधुरं कषायं शीतं मृदु गुरु पित्तहरं कफकरं रक्तपित्तघ्नम्।** ( ध. ४.७५ )

**कदलीपुष्पं कृमिहरम्**

हिं.–केला.
म.–केळ.
गु.–केळा.
बं.–काला.
त.–कदली.

**कनकरम्भा, सुवर्णरम्भा**
सोनकेळ.

**फलगुणाः–स्वल्पाशने दीपनी तृष्णापहा दाहविमोचिनी** ( रा. ४.११६ )

एक वनस्पती. केळीचे झाड. जलभूयिष्ठ देशातले लांब पानांचे फळांचा घड येणारे झाड क्षार काढण्याला उपयुक्त एक द्रव्य. केळीचा क्षार मेंढीच्या मूत्रात प्याल्याने लघ्वीतील रेव जाते. कोवळे फळ अधिक तुरट. **गुण**–गोड, तुरट, थंड, मऊ, जड, पित्तहारक, रक्तकारक, रक्तपित्तनाशक. केळीचे फूल कृमिनाशक. सोनकेळ थोडे खाल्ल्यास दीपक तहान दाहनाशक.

**काष्ठकदली, कदलीभेदः कदली** ( ध. ४.७८ )
केळीचा प्रकार. रानकेळ. चवई.

**–क्षार**–पु., **कदल्याः क्षारः कुष्ठहरप्रलेपे उपयुक्तः**
( चचि. ७.८९ )
केळीच्या झाडाचा क्षार. कुष्ठनाशक लेपात उपयुक्त.

**–गर्भ**–पु., **गर्भस्था कदली** ( चक्र. चचि. २१.७३ )
अगदी कोवळे अंकुरासारखे केळ. केळीच्या झाडाचा आतला गाभा.

**–दल**–न., **कदलीपर्णम्, रक्तपित्ते प्रच्छादनार्थमुपयुक्तम्** ( चचि. ४.१०७ )
केळीचे पान, रक्तपित्तात झाकण्याकरिता उपयुक्त.

**–फल**–न., **कदल्या फलम्, 'दध्ना तक्रेण तालफलेन वा कदलीफलं नाभ्यवहरेत् ।'**
( असंसू. ९ अहसू. ७.३५ )
केळ ( फळ ) केळे दही ताक दूध यांच्याशी खाऊ नये. केळ खाल्ल्यानंतर किंवा अगोदर दूध दही ताक खाऊ नये. ताडाच्या फळाबरोबर केळे खाऊ नये. दोषवर्धक, रोगकर.

**–मृग**–पु., **मृगवर्गीयः,=कदली, 'बृहत्तमबिडालसमो व्याघ्राकारः ।'** ( ड. सुचि. ८.३७ )
मोठ्या मांजरासारखा वाघाच्या आकाराचा.

**कदाहार**–पु., **कुत्सिताहारः** ( चशा. ८.२४ )
कदन्न. तृणधान्याचा आहार. पोषणाच्या शरीरपुष्टीच्या दृष्टीने कमीप्रतीचा आहार.

**कदुष्ण**–वि., **ईषदुष्णम्** ( असंक. २.१४६ )
थोडे उष्ण, कोमट.

**कनक**–पु., **वनस्पति० तूणिः=नन्दिवृक्षः** ( ध. ३.१८ )
नांदरुख.

**किङ्किरातः** ( रा. १०.४१५ )
बाभूळ, अशोक, काळी कोन्हांटी.

**चम्पकमूलम्** ( र. ३०.६४ ) चांफ्याचे मूळ.

**आरग्वधः** ( र. ३०.६४ ) बहावा.

पु., न., **धत्तूरः** ( चचि. २३.७८ ) **पीतधत्तूरः** ( सुशा. ४.६० ) **कृष्णबीजपुष्पो धत्तूरः** ( र. ११.९०–९२ ) **उपविष०** ( र. १०.८७ ) **धत्तूरः**
( रा. ४.७ )
पिवळा धोतरा. काळा धोतरा. ( हा विषारी असतो उपविष )

पु., **निर्यास०=कणगुग्गुलु** ( रा. १२.१८६ ) गुग्गुळ.

**=कासमर्दः** ( ध. ४.११८ ) कासविंदा.

न. लोह० सुवर्णम् (र.१४१) खनिजधातुः सुवर्णम् (ध. ६.१ सुचि. २४.१०१) ब्राह्मरसायने उपयुक्तम् ( चचि. १.५८ )
सोने. खनिजधातु, ब्राह्मरसायन कल्पात उपयोगी.
लोहेष्वन्यतमम् ( र १.४१ ) धातूंपैकी एक धातू.
( पुं. न. ) वनस्पति=नागकेसरम् ( चचि. १.४९ ) ( चचि. ) ( १४.१६६ ), ( ध. २.४८ ) नागकेशर.

**–क्षीरी**–स्त्री., वनस्पति०=काञ्चनक्षीरी ( सुसू. ११–१३ ध १-२४२ )
सुवर्णक्षीरी, पिवळा धोत्रा, पिसोळा, काटेधोत्रा, कङ्कुष्ठम् ( चक्र. चचि. ७११ )
एक दुर्मिळ धातु.

**–क्षीरीतैल**–न., सिद्धतैलम् योग० कण्डूनाशकम् ( चचि. ७.१११–११६ )
धोतरासिद्ध तेल, खाजनाशक.

**–गैरिक**–न., सुवर्णगैरिकम् ( सुक २.५१-५२ )
सोनकाव, सोनागेरू.

**–पुष्पी** स्त्री., वनस्पति० =कांचनक्षीरी, श्वित्रप्रशमनं लेपे ( चचि. ७.१६७ )
'कनकक्षीरी' कोडावर लेपासाठी उपयुक्त.
पहा पिवळा धोत्रा.

**–प्रभ**–( पु., ) वनस्पति० सोम० ( सुचि. २९.५ )
सोम या दिव्य वनस्पतीचा एक प्रकार.

**–प्रभा**–( स्त्री., ) वनस्पति० तेजस्विनी, तेजोवती ( रा. ३.३९२ ) मालकांगोणी, पिवळी जुई.
सुवर्णयूथा=यूथिका ( रा. १० २५२ )

**–प्रसवा**–( स्त्री., ) वनस्पति० सुवर्णकेतकी, केतकीभेदः ( रापरि. १०.३ )
सोनकेवडी, पिवळी केवडी, केवडीचा प्रकार.

**–बिन्द्वरिष्ट**–( पुं., ) अरिष्टयोग० महाकुष्ठघ्नः ( चचि. ७.७६-७९ )
एक अरिष्ट. महाकुष्ठाचा नाश करणारे.

**–रम्भा** ( स्त्री., ) वनस्पति० सुवर्णकदली, = कदली ( रा. ११.११४ ) सोनकेळ.

**–रस**–( पु., ) खनिज० =हरितालम् ( रा. १३.५९ ) हरताळ. खनिज द्रव्य.

**–सार**–( पु., ) धत्तूररसः ( २५.११९ )
धोतऱ्याचा रस.

**–सुन्दर**–( न., ) पारदयोग० त्वग्विकारनाशकः (र. २०-५०-५२); राजयक्ष्मादिघ्नः (र. ४-२-१४) ग्रहण्यादिहरः ( र. १६.५२ तः ५४; ) अर्शोरोगविषमज्वरवातरोगादिघ्नः ( र. १५.५३-५८ )
पाऱ्याचा योग, त्वचेचे रोग, क्षय, ग्रहणी, मूळव्याध, विषमज्वर, वातरोग इ० नाशक.

**–सुन्दर** न. सिद्धौषधिपारदयोगसुवर्णाभ्रकसत्त्वे समभागिके तत्समं च गन्धकं मूषायां विपाच्य त्रिकटुचित्रकविडङ्गवत्सनाभपारदशृङ्गीदेवदारूणि चार्धभागिकानि संमील्याजमूत्रेण संमर्दयेत् । मात्रा-गुञ्जा; फलम्–वातकफजकुष्ठमर्शोऽग्निमान्द्यनाशकम् ( र २०.५०–५२ )
पाऱ्याचा एक योग. कुष्ठनाशकयोग. सुवर्ण व अभ्रकसत्व समभाग, त्यांच्या इतका गंधक मुशेत पचवून सुंठ, मिरी, पिंपळी, चित्रक, वावडिंग, बचनाग, पारा, शृंगीविष देवदार ही अर्धाभाग मिसळून बकरीच्या मुतात खलावे. प्रमाण एक गुंज. **गुण**–वातकफज कुष्ठ, मूळव्याध, अग्निमांद्यनाशक.

**–स्तम्भा**–( स्त्री., ) वनस्पति सुवर्णकदली ( कदली ) ( रा ११.११५ ) सोनकेळ.

**कनकलोद्भव**–( पुं., ) वनस्पतिनिर्यास० सर्जरसः रालः, 'राळ' इति लोके ( रा. १२ १७६ )
राळ; झाडाचा डिंक.

**कनकाकरोद्भव**–( न., ) खनिजतुत्थकः, =तुत्थम् ( डसुउ. १७.३९ ) मोरचूद.

**कनकाभिधाना**–( स्त्री., ) सुवर्णक्षीरिका, कांचनक्षीरी ( सूचि. २५.३८ ) पाठभेद
पहा 'कनकक्षीरी' पिवळा धोतरा.

**कनकारक**–( पु., ) वनस्पति० कोविदारः ( रा. १०.२९३ ) कांचन, बहावा. कोरळ.

**कनकारिष्ट**–( पुं. न. ) अरिष्टयोग० अर्शोघ्नः ( चचि. १४.१५८--१६८ )
धोतऱ्याचे अरिष्ट मूळव्याधीवर चांगले.

**कनकाह्वय**–( न., ) वनस्पति० कङ्कुष्ठम्, नागकेसरमित्यन्ये ( ड. सुसू. ४४.४९--५१ ) नागकेशर.

**कनखल**–( न., ) ग्राम० गङ्गातीरस्थानम् ( काकसंहिताकल्पाध्याय २ २१–२२ )
गंगेच्या काठी असलेले एक तीर्थस्थान. हरिद्वारपासून दोन मैलावर.

**कनिष्ठा**–(स्त्री.,) कनिष्ठिका ( सुसू. ३५.१२ )
आंगठ्यापासून पाचवे बोट, सर्वात लहान करंगळी.

**कनिष्ठिका**–( स्त्री .,) शरीरावयवाऽङ्गुलि० (सुचि. २४,४) लघुतमाऽङ्गुलिः अङ्गुष्ठात्पञ्चमाऽङ्गुलिः (सुसू. ३५.७) तस्या आयामः हस्तकनिष्ठिकायाः

साधैभ्यङ्गुलः साधैभ्यङ्गुलौ कनिष्ठाङ्गुष्ठौ। (सुसू. ३५.१२) पादकनिष्ठिकायामः नखं विहाय एकाङ्गुलम्, 'पादाङ्गुष्ठप्रदेशिन्यौ द्व्यङ्गुलायते, प्रदेशिन्यास्तु मध्यमानामिका कनिष्ठिका यथोत्तरं पञ्चमभागहीनाः।' प्रदेशिन्याः सकाशान्मध्यमाङ्गुलिः पञ्चमभागहीना, ततोऽपि मध्यमायाः सकाशात् अनामिकापञ्चमभागहीना, ततोऽपि अनामिकायाः कनिष्ठिका पञ्चमभागहीनेत्यर्थः, पञ्चमभागस्तु अर्धाङ्गुलमात्रः (ड. सुसू. ३५.१२)
सर्वात लहान करंगळी. शारीर अवयव. लांबी साडेतीन अंगुळी. आंगठाही इतक्याच लांबीचा. पायाच्या कनिष्ठिकेची लांबी नख सोडून एक अंगुळ. पायाचा अंगठा व जवळचे बोट दोन अंगुळे. पुढची क्रमाने पंचमांश कमी प्रमाणाची. पंचमभाग म्हणजे अर्धांगुळ.

**–परिणाह**–वि., **कनिष्ठिकासमस्थूलमित्यर्थः** (सुचि. ४०.५)
कनिष्ठिकेइतकी जाड.

**कनीन**–पु., **शारीर०=कनीनक** (सुउ. १५.९) (असंसू. ५.५२)
नाकाजवळचा डोळ्याचा सांधा.

**कनीनक**–पु., शारीर० **नेत्रगतो नासासमीपस्थः सन्धिः** (सुउ. १५.९) (असंसू. ३२ (४) अहृसू. २३.३) **नासासमीपस्थः प्रदेशः** (सुउ. १.१६)
नाकाजवळचा डोळ्याचा प्रदेश.

**कनीनका**–स्त्री., **कनीनक** द्र० कनीनक (अहृसू. २३.३)
पहा 'कनीनक.

**कनीनी**–स्त्री., **शारीर०=कनिष्ठिका** (अहृसू. २.३;) (अहृसू. २५.३८) सर्वात लहान करंगळी.

**कनीयस्**–पु., **वनस्पति० सोमभेदः** (सुचि. २९.५)
दिव्य वनस्पती, सोमाचा प्रकार.

**कन्था**–स्त्री., **वस्त्र० अनेकवस्त्रसंयोगजं प्रावरणम्** (चशा. ५.१२)
गोधडी. अनेक कपडे एकत्र करून शिवलेली पांघरण्याची गोधडी.
**वनस्पति० कन्थारी** (रा. परि. ८.२०)
फणीनिवडुंग.

**कन्थारी**–स्त्री., **वनस्पति० गुणाः–कटुतिक्तोष्णा दीपनी रुच्या कफवातघ्नी शोफघ्नी** रक्तग्रन्थिरुजा पहा. (रा परि ८.२०)
एक वनस्पती. फणीनिवडुंग. तीक्ष्ण काट्याची वनस्पती. **गुण**–तिखट, कडु, उष्ण, दीपक, रुचकर, कफवातनाशक सूज, रक्तीगाठ वेदनानाशक.

**कन्द्**–पु., **वनस्पति० ग्रन्थिरूपं मूलम्** (चसू. १.७४; र. २.८३;) **औदकाः कन्दा यथा कशेरुशृङ्गाटकशालूकादयः** (सुचि. ५.२२) **अग्राह्याः कन्दाः**—यथा **'बालं ह्यनार्तवं जीर्णं व्याधितं क्रिमिभक्षितम्। कन्दं विवर्जयेत् सर्वं यो वा सम्यङ्ग रोहति॥'** (सुसू. ४६.३१२) **शाकोपयोगिकन्दाः—विदारीकन्द-शतावरी-बिस–मृणाल-शृङ्गाटक-कशेरुक–पिण्डालुक–मध्वालुक–काष्ठालुक–शङ्खालुक–रक्तालुक–इन्दीवरोत्पलकन्दप्रभृतीनि** (सुसू. ४६.२९८) **तद्गुणाः–मधुराः शीता गुरवो रक्तपित्तहरा बहुशुक्रकराः स्तन्यवृद्धिकराश्च** (सुसू. ४६.२९९)
गांठी सारखे गोल, लंबगोल आकाराचे मूळ. कांदा, गड्डा. पाण्यात होणारे कंद. नागरमोथा, शिंगाडे, कमळकंद इत्यादी. **अग्राह्य कंद्**–अगदी कोवळा, अयोग्य ऋतूत झालेला, जुना, रोगट, किडलेला. व जो चांगला वाढत नाही असा घेऊ नये. भाजीला उपयोगी कंद--भुइकोहळा, शतावरी, कमळमूळ, कमळमुळाचे धागे, नागरमोथा, अळू, कासाळू, पांढरे राताळू, लाल रताळू, कमळकंद.
**गुण**–गोड, थंड, जड, रक्तपित्तनाशक, शुक्र फार वाढविणारे व दूध वाढविणारे.
**सूरणः**; (धपरि. ४.६) रान सुरण.
**वनस्पतिकन्द० अरण्यसूरणः सूरणभेदः वनसूरणः** (र ११.९०–; रा ५.८) रानसुरण.
**रोग० गुदस्थस्थूलमांसाङ्कुरः अर्शोभेदः** (सुनि. २.४)
गुदाला मांसाचे जाड अंकुर निर्माण होतात ते. मूळव्याधीचा एक प्रकार.

**(कन्दा)**–स्त्री., **वनस्पति० कन्दोद्भवा=गुडूची** (ध.नि. १.५) गुळवेल.
**न. वनस्पति० गृञ्जनम्** (रा. ७.५५) गाजर.

**–ग्रन्थिन्**–पु., **वनस्पति० रोमकन्दः गुणाः–मधुरः शीतो गुरुर्वृष्यः सन्तर्पणो मूत्रकृच्छ्रदाहशोष–प्रमेहघ्नः** (रा परि ७.२४)
पांढरा रताळू, पांढरे रताळे. **गुण**–गोड, थंड, जड, शुक्राला हितकर, पौष्टिक, कष्टाने लघ्वीला होणे, दाह, शोष, प्रमेह नाशक.

**—फल**—न., वनस्पति० कङ्कोलकम् ( ध ३.३७ ) कंकोळ.

**—फला**—स्त्री., वनस्पति० विदारिका विदारी ( रा. ७.१९४ ) भुईकोहळा.

**—बहला**—स्त्री., वनस्पति० तिलकन्दः ( रा. ७.५३ ) तेल्याकांदा.

**—मूल**—न., वनस्पति०=मूलकम् ( रा. ७.५० ) मुळा.

**—राल**—पु., वनस्पति० आक्षोडः=अक्षोटः ( रा. ११.८२ ) आक्रोड.

**—रोहिणी**—स्त्री., वनस्पति० गुडूची ( ध. १.४ ) गुळवेल.

**—लता**—स्त्री., वनस्पति० कडुडुञ्ची ( ७.२८१ ) लहान कारले.

=मालाकन्दः ( रापरि. ७.४४ ) मालाकंद.

**—वर्धन**—पु., वनस्पति० सूरणः ( धपरि. ४.६ ) सुरण.

**—वल्ली**—स्त्री., वनस्पति० त्रपुस० वन्ध्याकर्कोटकी वांझकर्टोली.

**—विष**—न., स्थावरविषभेद०, तन्नामानि—कालकूट—वत्सनाभ—सर्षप—वालक—कर्दमक—वैराटक—मुस्तक—शृङ्गीविष—प्रपुण्डरीक—मूलक—हालाहल—महाविष—कर्कटकानि इति त्रयोदश कन्दविषाणि (सुक. २.५) 'कन्दजानि तु वाल—साक्तुक—क्रौञ्चक—बलाहलक—गालव—मर्कटक—करवीर—केन्द्रायुध—साङ्कोचक—लाङ्गलक—तैलपयकुशमुस्तेन्द्रमुष्कक—रोहिषाजनाभ—कादीनि ( असंसू. ४०. पृ. ३१० ) गुणाः—तीक्ष्ण-विषत्वात्सद्यःप्राणहरम्, उग्रवीर्यम् ( सुक. २. ११ ) ज्वरहिध्मातन्द्रादन्तहर्षहनुस्तम्भगलग्रहफेन-वमनाऽरुचिश्वासमूर्च्छाकरम् ( असंउ. ४०. पृ. ३३० )

**कंदविषे**—स्थावरविषप्रकार. सुश्रुतात तेरा. त्यांची नावे वर आहेत. वत्सनाभ म्हणजे बचनाग. अष्टांग-संग्रहात निराळी आहेत. करवीरक, कण्हेर, लांगलक, कळलावी. इ० **गुण**—तीक्ष्ण, ताबडतोब प्राणनाशक, उग्रवीर्य, ताप, उचकी, झापड, दातात शिरशिरी, हनुवटी जखडणे, घसा धरणे, तोंडाला फेस, अरुचि, श्वास व मूर्च्छा करतात.

**—सूरण**—पु., वनस्पति० सूरणः ( धपरि. ४.६ ) सुरण.

**कन्दामृता**—स्त्री.,वनस्पति० गुडूची ( रा. ३.३ ) गुळवेल.

**कन्दार्ह**—पु., वनस्पति० सूरण ( धपरि. ४.६ ) सुरण.

**कन्दाद्य**—पु., वनस्पति० वनकन्दः धरणीकन्दः ( रापरि. ७.४२ ) दांडक्यासारखा लांब रानकांदा.

**कन्दालु**—स्त्री., वनस्पति० कासालुः ( रापरि. ७.२८ ) कासाळु.

धरणीकन्द ( रापरि. ७.४२ ) दांडक्यासारखा लांब रानकांदा.

**कन्दोत्थ**—न., वनस्पति० पुण्डरीक० नीलोत्पलम् कुमुदम् ( रा. १०.२४८ ) तांबडे कमळ. नीलकमळ. कमळे.

**कन्दोद्भवा**—स्त्री., वनस्पति० गुडूची ( ध. १.५ ) गुळवेल.

**कन्दरोद्भवा**—स्त्री., वनस्पति० चतुष्पत्री, क्षुद्रपाषाण-भेदः ( रा. ५.२१५ ) क्षुद्र पाषाणभेद.

**कन्दर्प**—पु., कामदेवः ( सुचि. २९.१८ ) मदनविकार.

—पलाण्डुः—पु., वनस्पति० ( गी. ल. को. ) कांदा.

**जीव**—पु., वनस्पति०=कामवृद्धि ( रापरि. ४.५१ )

**कन्दल**—न., वनस्पति० आर्द्रकम् ( ध. २.८४ ) आले.

**( कन्दली )**—स्त्री., वनस्पति०—पद्मबीजम् ( ध. ४.१५९) कमळबीज.

**कन्दाल**—पु., वनस्पति० करवीरकन्दः तैलकन्दः ( रापरि. ७.५३ ) तेल्याकंद. तेल्या कांदा.

**कन्दिन्**—पु., वनस्पतिकन्द० सूरणः ( रा. ७.५ ) सुरण.

**कन्दु**—पु., स्त्री., लोहमयं न्युब्जं पचनपात्रम् यथाऽपूप-पचनार्थम् ( सूसू. ४६.३५७ अहसू. ६.४२ ) **कन्दुपाचितमांसम्—जलोपसेकं विना केवले लोहमये पात्रेऽग्निना तप्तं मांसम्** ( सुसू. ४६.३५६ ) कढई, तवा, खोल तवा, कढईत भाजलेले मांस. पाणी न शिंपडता कढईत भाजलेले मांस.

वनस्पति० करवीरः ( रा. १०.२ ) कण्हेर.

**—यन्त्र**—यंत्र० जलयुक्ता वस्त्रेण मुखावच्छिन्ना स्थूला स्थाली, यस्यां स्थालिकान्तरपिहितमुखायां वस्त्रोपरि निक्षिप्तं स्वेद्यद्रव्यमधोभागस्थितेनाग्निना स्वेद्यते । यद्वा वस्त्रस्थाने तृणोपरि तृणक्षेपेण निर्मीयमाणया स्थाल्यादिकृतसंकेता स्वेदनीययन्त्र-मित्यपरसंज्ञम् । ( र. ९.७६–७८ ) एक यंत्र. मोदकपात्र. तळाशी पाणी, वर मध्ये गवत कापडाचा दादरा किंवा जाळी वा भोके असलेली थाळी ठेवून आणि त्याच्यावर शिजविण्याचे मोदक, पातोळे, मुटकळे इत्यादी पदार्थ ठेवून झाकण बंद करून आतल्या वाफेवर पदार्थ शिजवण्याचे पात्र.

**-संस्थान**–वि., वर्तुलाकृतिः ( असंसू. २६.१५ ) वर्तुळाकृति.

**कन्दुक**–पु., वनस्पति० **पूगीफलम्** ( र. ११.१३१ ) सुपारी.

-न., **अपूपपचनपात्रम्, तापस्वेदार्थम्** ( सुचि ३२.४ ) कढई, तवा, खोलतवा.

**-यन्त्रम्**–न.. कन्दुकयन्त्रम् ( र. ५.२४३ ) एक यंत्र, मोदकपात्र.

**कन्धरा**–स्त्री., शारीरावयव० **ग्रीवा** ( असंउ. २७. पृ. १९७ ) ( असंशा. ८.३२ मान ).

**कन्यकपञ्चमूली**–स्त्री., वनस्पतियोग० **लघुपञ्चमूलम्** ( सुउ. ४८ २१ )

रिंगणी, डोरली, सालवण, पिठवण व गोखरू असे लहान पंचमूळ.

**कन्यका**–स्त्री. वनस्पति० **कुमारी** ( रापरि ५.१० ) ( र. १४.५२ ) कोरफड.

**भद्रैला**, द्र० **एला** ( ध. २.४६ ) मोठी वेलची, मोठा वेलदोडा.

**कन्या**–स्त्री., **अप्राप्तद्वादशवर्षा** ( सुचि. ३७.१०५ ) बारा वर्षांच्या आतली मुलगी.

वनस्पति० **स्थूलैला** ( इन्दु.असंउ. २८.२०९ ) एला मोठी वेलची.

**गुडूची** ( ध. १.५ ) गुळवेल.

**वाराहीकन्द** ( रा. ७.१३४ ) डुक्करकंद.

**घृतकुमारी**, द्र० **कुमारी** ( रापरि ५.१० ) ( र. ११.१०३ ) कोरफड.

**महौषधि**० **सोमसमवीर्या महौषधिः, 'कान्तैर्द्वादशभिः पत्रैर्मयूराङ्गरुहोपमैः । कन्दजा काञ्चनक्षीरी कन्या नाम महौषधी** ( सुचि ३० ५–१६ ) **तस्याः प्राप्तिस्थानं काश्मीरस्थं क्षुद्रकमानसं सरः; तत्र वसन्ते दृश्यते** ( सुचि. ३०.३३ )

एक महौषधि. सोम या दिव्य वनौषधि सारखी उत्कृष्ट कार्यकारी, काश्मीरमध्ये लहान मानससरोवरा जवळ होते. मोराच्या पिसासारखी १२ पाने येणारी वनस्पती, कन्या, कंदजा, कांचनक्षीरी, महौषधि अशी नावे आहेत.

**कपट**–न., वनस्पति० **कतृणम्** ( ध. १.८२ ) रोहिस गवत.

**कपटा**–स्त्री., वनस्पति० **कासघ्नी; कण्टकारीभेदः** ( ध. १.९८ ) भुईरिंगणीचा प्रकार.



**कपटेश्वरी**–स्त्री., **कण्टकारी** ( ध. १.९८ ) भुईरिंगणी. **लक्ष्मणा** ( रा. ४.१२४ ) पांढरी भुईरिंगणी.

**कपर्द**–पु., जाङ्गमद्रव्य० **कपर्दिका** ( धपरि. ३.२४ ) ( र. ३.१३४ ) कवडी.

**कपर्दिका**– ( स्त्री. ) जाङ्गमद्रव्य० **गुणाः कटुतिक्तोष्णा दीपनी वृष्या नेत्र्या वातकफघ्नी कर्णशूलव्रणगुल्मशूलनेत्ररोगपरिणामशूलग्रहणीक्षयहरा** ( धपरि. ३.२४ )

कवडी. समुद्रात होणाऱ्या एका किड्याचा अस्थिरूप कोश. **गुण**–तिखट, कडू, उष्ण, दीपक, शुक्राला व डोळ्यांना हितकर, वातकफनाशक, कानातील शूळ, व्रण, गुल्मशूळ, नेत्ररोग, परिणामशूळ, ग्रहणी, क्षयनाशक.

**कपाट**–( पु ) **काष्ठपट्टकपर्यङ्कः** ( असंउ ३२.२४२ ) लाकडाच्या फळ्यांचा पलंग. हाड तुटल्यावर त्या अवयवाची हालचाल करता येऊ नये म्हणून त्या अवयवाभोंवती अनुरूप आकाराच्या बांधावयाच्या लाकडी फळ्या.

**-शयन**–(न.,) **भग्नजङ्घोर्वोः कपाटेऽवस्थितिः कपाटशयनविधिः अयं जङ्घोरुभङ्गयोः पश्चात्कर्मविशेषः । भग्नो भागः कपाटे कीलैः स्थिरः क्रियते, येन चलनवर्जितत्वादस्थिसन्धानं सत्वरं भवति । इदं च कपाटमिव कपाटं भग्नावयवसदृशम् । तस्मिंश्च भग्नमवयवं सम्यगवस्थापयित्वा तत्राऽपि तस्य स्थिरीकरणार्थं पञ्च कीलाः कथ्यन्ते–ते च उभयतो द्वौ द्वौ तले चैक इति पञ्च** । ( सुचि. ३.४८–४९ ); **उभयभङ्गापेक्षया तु सप्तभिरेव कीलैः यन्त्रणम् । तथाहि उभयतो बहिर्द्वौ गुल्फयोर्द्वौ जानुनोर्द्वौ वङ्क्षणयोः तले चैक एवं सप्त** ।' ( ड. सुचि. ३.४८–४९ )

पोटऱ्या व मांड्यांमध्ये अस्थिभंग झाल्यावर तो अवयव त्याला अनुरूप लाकडी फळ्यांमध्ये पक्का करून बांधून ठेवणे.

मांडी व पिंढरीची हाडे मोडली तर फळ्या बांधाव्या. **विधि**–भंगाच्या हाडाचा भाग फळ्याच्या आवरणात ठेवावा व खिळ्यांनी फळ्या पक्क्या कराव्या यामुळे भंगलेला भाग स्थिर राहिल्याने चलनवलन न होता हाड लवकर सांधते. भंगलेल्या अवयवांना अनुरूप अशा फळ्या घ्याव्यात, दोन बाजूला दोन दोन व तळाशी एक खिळा ठोकावा. दोन्ही पायात भंग असेल तर सात खिळे. घोटे, गुडघे, जांघ यांच्या जवळ दोन दोन व तळात एक खिळा ठोकावा.

**–संधिक**–पु., बन्ध० पञ्चदशकर्णबन्धेष्वेकः, अभ्यन्तरदीर्घैकपालिरितराल्पपाल्या सह बहिःसंधानात्कपाटवत्सन्धानं यत्र, सः कपाटसन्धिकः (सुसू. १६.१०)

कान बांधावयाच्या पंधरा बंधांपैकी एक बंध. कानाच्या आतल्या बाजूला अनुरूप आधारभूत पट्टी लांब व बाहेरची लहान पट्टी घेऊन बंध बांधणे याला कपाटसंधिक बंध म्हणतात.

**कपाल**–पु., न., मृद्घटखण्डः (सुचि. २०.६०)
मडक्याचा तुकडा, खापर.
न., अस्थि० (चसू. ५.६०)
कपालास्थि–जानुनितम्बांसगण्डतालुशङ्खशिरःसु कपालानि (सु शा. ५.२०)
खापराच्या आकारासारखे हाड. गुडघा, ढुंगण, खांद्याचा पाठीचा भाग, गालाच्या वर, टाळू, कानशिल, डोके यांची हाडे या आकाराची असतात.
न., शारीर० शिरसः उपरितनः प्रदेशः (असंउ. २७) डोक्याचा वरचा भाग.
न., रोग०=कपालकुष्ठम् (चनि. ५.८(१)
एक रोग. कुष्ठ प्रकार.

**–कुष्ठ**–न., रोग० महाकुष्ठेष्वेकम्, रूक्षाऽरुणपरुषाणि विषमविसृतानि खरपर्यन्तानि तनूनि उद्धृत्ततनूनि सुप्तवत्सुप्तानि हृषितलोमाचितानि निस्तोदबहुलानि अल्पकण्डूदाहपूयलसीकान्याशुगतिसमुत्थानानि आशुभेदीनि जन्तुमन्ति कृष्णारुणकपालवर्णानि च कपालकुष्ठानि विद्यात् (चनि. ५.८(१) कृष्णकपालिकासदृशवर्णत्वात् कपालकुष्ठम् (सुनि. ५.७–८) द्र० 'कुष्ठ'
खापराच्या काळसर तांबडसर वर्णाचे, रूक्ष. खरखरीत, वाकडे तिकडे पसरलेले, खरखरीत वळलेली व पातळ कडा असलेले, स्पर्श नाहीसा झालेले, रोमांचयुक्त, टोचणी अधिक. कंडू कमी. दाह, पू व स्राव कमी, लवकर उत्पन्न होणारे व फुटणारे आणि जंतुयुक्त हे कुष्ठ असते.

**–चूर्ण**–न., नवमृण्मयघटखण्डचूर्णम् (सुसू. १६.१५)
नव्या मातीच्या मडक्याच्या तुकड्याचे चूर्ण.

**–मालिनी**–स्त्री., रेवतीग्रह० यस्याः स्त्रियाः जातमपत्यं चतुर्दशेऽहनि विनश्यति सा जातहारिणी (का. रेवती क. ४७)
रेवती बालग्रह. या ग्रहाने बाधा झालेल्या ज्या स्त्रींचे मूल चौदाव्या दिवशी मरते तिला जातहारिणी म्हणतात.

**–रोग**–पु., शिरोरोगः (चसि. २.२२) शिरस्येव कपाले व्याधिः (असंसू. २७)
डोक्याच्या हाडांचा रोग.

**कपालिका**–स्त्री., शरावकर्परिका (सुचि. १.९६)
मातीच्या परळाचे खापर.
दन्तरोग०, दन्तशर्करोपेक्षिता सत्यणुशो दन्तकपालानि शातयति। (सुनि. १६.३३ असंउ. २५)
लेखनचिकित्सा कार्या (सुचि. २२.३८)
दंतशर्करा रोगाची उपेक्षा केल्यास दाताचे सूक्ष्म सूक्ष्म पापुद्रे निघतात. दांताचा एक रोग. दांतावर हिरड्यांवर सांध्यात जमणारे कडक किट्टण. चिकित्सा-हळू हळू तासून काढणे.

**कपालिन्**–पु., सप्तविंशतिसंख्याकेष्वन्यतमो रससिद्धिप्रदायकः आचार्यः (र. १.२)
२७ रससिद्धांपैकी एक आचार्य.

**कपाली**–स्त्री., वनस्पति० विडङ्गम् (रा. ६.१६)
वावडिंग.

**कपि**–पु., पशु०=मर्कटः (अहृशा. ३.९५)
एक पशु, माकड, वानर.
सुगन्धिद्रव्य०=तुरुष्कः (ध. ३.२२)
घनक्काथ, ऊद, धूप.

**–कच्छू**–स्त्री., वनस्पति० गुणाः–मधुरा, तिक्ता, शीता (उष्णा च) गुरुर्बल्या, वृष्या, बहुमला, पुंस्त्वदायिनी, वातघ्नी, पित्तास्रघ्नी, दुष्टव्रणनाशिनी (चसू. २७.३४) (ध. १.१५१–१५२)
हिं.—कौंछ, किवाँच.
म.—**कुहिलीचे बीज, खाजकुहिली.**
गु.—कउचों, मेरवनी शीगनी बी.
बं—आलकुशी, धनारगुण्ड, दया, शुयाशिंबी.
ता.—युनाइक, कालि.
एक वनस्पति. गोड, कडू, थंड. जड. बलवर्धक, पुरुषत्व देणारी, मलवर्धक, शुक्रवर्धक, वातघ्न, रक्तस्राव कमी करणारी व दुष्ट व्रण शुद्ध करणारी.

**–कच्छूफलोपमा**–स्त्री., वनस्पति० जन्तुका, जन्तुकारी (रा. ३.१२८) एक वनस्पती.

**–कच्छूबीजतैल**–न., तैल० कपिकच्छूबीजभवं तैलम् मधुरं, कषायमुष्णं, स्निग्धं, गुरु च (ध. ६.१३५)

कवचबीजाचे तेल, गोड, तुरट, उष्ण, स्निग्ध व जड.

**–चूत**–पु., वनस्पति० **आम्रातकः** ( ध. ५.१२ )
आंबाडा.

**–ज** पु., **सुगन्धिद्रव्य० तुरुष्कः** ( ध. ३.२२ )
पहा 'कपि'.

**–तैल** न., **सुगन्धिद्रव्य० तुरुष्कः** ( ध. ३.२२ )
पहा 'कपि'.

**–त्थ** पु., वनस्पति० ( चसू. २५.४०; ) **आमं कपित्थं मधुराम्लकषायतिक्तं, शीतमस्वर्यं, ग्राहि, वृष्यं, वातकरं, कण्ठघ्नं, विषघ्नम्** ( चसू. २७.१३६–१३७ ) **त्रिदोषकृत्** ( असंसू. ७ ) **कफहरं च** ( ध. २.१०२ ) **पक्वं कपित्थं मधुराम्लं कषायं, गुरु, कण्ठशोधनं, दोषघ्नं, विषघ्नं, ग्राहि, सुगन्धि, रुचिप्रदम्** ( चसू. २७.१३६–१३७ ) **कफवातहरं, श्वासकासारुचितृष्णाहरं, हिध्मावमथुजित्** ( असंसू. ७; ध. २.१०२ ); **सर्वं ग्राहि विषघ्नम्. नालच्छेदनानन्तरं बालकपित्थपत्रकषायेण स्नापयेत्** ( असंउ. १ ) **विषसंसृष्टेऽञ्जने अस्य पुष्पमञ्जनार्थमुपयुज्यते** ( सुक. १.६९–७१ ) **कपित्थरसो मधुसंयुक्तो मूषिकविषे उपयुज्यते** ( सुक. ७.३८ ) **अस्य रसः हिक्काशमनार्थमुपयुक्तः** ( सुउ. ५०.२५ ) **वृन्तं पित्तविदग्धायां कफविदग्धायां च दृष्टावञ्जनविधिनोपयुज्यते** ( सुउ. १७.७ ) **कपित्थपञ्चाङ्गघृतं सर्वमूषकविषहरम्** ( सुक. ७.४० )
हिं.—कवट, कविठ.
म.—**कवठ.**
गु.—कविट.
बं.—कगबेल.
ता. विलाकपिट्टम्, वेल्लिल.
फा.—कविटा.
एक वनस्पति. कच्चे कवठ. त्रिदोषकर, थंड व घशाला घातक, पुष्टिकर, वातकर, विषनाशक. **पक्के कवठ**–गोड, आंबट, तुरट, जड, सुगंधी, रुचकर. कंठशोधन, दोषविषनाशक, पातळ मळ घट्ट करणारे, कफवातहर, ओकारी, उचकी, श्वास, खोकला, तहान नाहीशी करणारे. **पान**–बालकाचे नाळ कापल्यानंतर पानाच्या काढ्याने स्नान घालावे. **फूल**–विषारी अंजन केल्यास याचे अंजन करावे, याचा **रस. पंचांगसिद्धतूप** उंदराच्या विषावर, व उचकीवर. **देठ**–कफपित्तज दृष्टीवर अंजन.

न., **वनस्पति० एलावालुकम्** ( ध. ३.७६ )
सुगंधी वाळूक. पहा 'एलवालुक'.

**–त्थतैल** न., **योग० योनिदौर्गन्ध्ये पिच्छिले योनिस्रावे च कपित्थसिद्धतैलं पिचुभिर्योजयेत्**; ( का. धात्रीचि. )
योनिस्राव बुळबुळीत व दुर्गंधी असल्यास हे कवठसिद्ध तेल बोळा ठेवण्यास उपयुक्त.

**–त्थासव** ( पु. न. ) **आसुत० कपित्थफलस्यासवः** ( असंसू. १० ) कवठाच्या गिराचे आसव.

**–पिप्पली** स्त्री., **वनस्पति० रक्तपुष्पोऽपामार्गः** ( अ. १.२६३ ) **'अपामार्ग'**
लाल आघाडा; पहा 'अपामार्ग.'

**–प्रिय** पु., **वनस्पति० कपित्थः** ( ध. २.१०२ )
कवठ.
**आम्रातकः** ( ध., ५.१२ ) आंबाडा.

**–भवबीज** न., **वनस्पति० कपिकच्छुबीजम्** ( र. २७. १२६–१२७ ) **द्र० कपिकच्छु**
कवचबीज; पहा 'कपिकच्छु.'

**–रथ** पु., **वानराणां रथः** ( असंशा. १२ )
वानर–माकडे जोडलेला रथ.

**–रोमफला** स्त्री., **वनस्पति० कपिकच्छूः** ( रा. ३.२०१ )
कवचबीज.

**–लोला** स्त्री., **वनस्पति० रेणुका** ( ध. ३.५१ )
रेणुकबीज.

**–लोह** न., **पित्तलधातुः** ( ध. ६.१८ )
पितळ.

**–ष्ठल** पु., **ऋषि० रोगापहरणचिन्तनार्थे हिमवतः पार्श्वसमेतेषु महर्षिष्वेकः** ( च. सु. १.९ )
रोग नाशनाचा विचार करणाऱ्या व हिमालयात त्यासाठी जमलेल्या ऋषींपैकी एक.

**–सख्य** न., **वानरमैत्र्यम् शोषिणां स्वप्नानां दर्शनेऽरिष्टत्वेन लक्ष्यमाणम्** ( सुसू. २९.६८–७१ )
माकडमैत्री. क्षयी माणसाला जर ही स्वप्नात दिसली तर निश्चित मृत्यु.

**कपिञ्जल**–पु., **विष्किरपक्षि० गौरतित्तिरिः** ( चसू. २७.४७ )
**तन्मांसं सरक्तपित्तश्लेष्मविकारेषु मन्दवातेषु शस्तम्** ( चसू. २७.६८ )
पांढरा तित्तिर. रक्तपित्त–कफविकारात थोडा वात असताना याचे मांस चांगले.

ऋषि० रोगापहरणाचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिर्ज्वेकः ( चसू. १.९ )
रोगनाशनाचा विचार करण्यांसाठी हिमालयाच्या परिसरात जमलेल्या ऋषींपैकी एक महर्षी.

**कपिञ्जलक**–पु., पक्षि० ( ध. ६.१० ) कपिञ्जलः
पहा 'कपिञ्जल, पांढरा तित्तिर'.

**कपिल**–पु., प्राचीनो रसाचार्यः, आद्यसांख्याचार्यः ( र. ६.५२ )
प्राचीन रसाचार्य. पहिले सांख्य आचार्य.
**वर्ण०** किञ्चित्ताम्रः, उज्ज्वलपिङ्गलवर्णः ( सुनि. ६.२६ असंसू. ६. ( चवि. ८.९९ )
एक रंग. किंचित तांबडा व भडक पिंगट वर्ण.
**मूषिक०** दष्टलक्षणम्–व्रणे कोथो ज्वरो ग्रन्थ्युद्गमस्तृषा च ( सुक. ७.२३–२४ )
एक उंदीर. चावला तर व्रण कुजतो, ज्वर गाठी व तहान हे उपद्रव होतात.
**पित्तलधातुः, राजरीतिः** ( ध. ६. ) पितळ.
**आग्नेयलूता०** इयं च स्वेदजा वर्तते, सा पित्तविकारदा भवति । तया दष्टस्य ताम्रा स्थिरा पिडका शिरोगौरवं, दाहस्तिमिरो भ्रमश्चेत्येतानि लक्षणानि भवन्ति ( सुक. ८.१०५ )
घामापासून होणारा आग्नेय कीटक. तांबड्या व कडक पुळ्या, डोके जड, दाह, दृष्टिमांद्य, भ्रम हे पित्तविकार हा चावला असता होतात.
**जलौका०** निर्विषाणां जलौकानामन्यतमा, मनःशिलारञ्जिताभ्यामिव पार्श्वाभ्यां युक्ता, स्निग्धमुद्गवर्णा ( सुसू. १३.१२ ) द्र० 'जलौका.'
एक बिनविषारी जळू. मनशीळाचा रंग ज्यांच्या बाजूच्या अंगाला दिसतो. व ज्या स्निग्ध मुगाच्या वर्णासारख्या असतात त्या.

**कपिला**–स्त्री., वनस्पति० द्राक्षाभेदः, उत्तरापथिका, द्र० 'द्राक्षा' ( ध. ५.५८ ) द्राक्ष. पहा 'द्राक्षा'.
**कुमारी** ( रापरि. ५.११ ) कोरफड.
**रेणुका** ( ध. ३.५१ ) रेणुकबीज.
**कुशिंशपा** ( ध. ५.१२१ ) शिसव.
**शिंशपा** ( रा. ९.१९८ ) शिसव.

**–द्राक्षा**–स्त्री., वनस्पति० द्राक्षाभेदः, उत्तरापथिका ( रा. ११.७६ ) द्राक्षांचा प्रकार.

**–फला**–स्त्री., वनस्पति० द्राक्षाभेदः उत्तरापथिका ( रा. ११.७६ ) द्राक्षांचा प्रकार.

**–शिंशपा**–स्त्री., वनस्पति० कुशिंशपा ( रा. ९.२०१ ) शिसवाचा प्रकार, हलका शिसव.

**कपिलाक्षी**–स्त्री., वनस्पति० कुशिंशपा ( रा. ९.२०१ )
शिसवाचा प्रकार; हलका शिसव.
**मृगाक्षी** ( रा. ७.२५७ )
एक वनस्पति.

**कपिलिका**–स्त्री., कीट० पिपीलिकाभेदः, दंशे चाग्निस्पर्शवद्दाहः शोफः श्वयथुश्च ( सुक. ८.३४ )
द्र० पिपीलिका.
एक किडा. मुंग्यांचा प्रकार. चावली तर अग्नीचा स्पर्श झाल्यासारखा दाह, सूज. पहा, 'पिपीलिका;

**कपीतक**–पु., वनस्पति०=प्लक्षः ( रा. ११.१२४ ध. ५.८१ )
एक वनस्पती. नांदरुख, पिंपरी.

**कपीतन**–पु., वनस्पति० गर्दभा(ण्डः) ( चचि. ३.२५८ )
लाखीपिंपरी, अंबाडा, पोफळ, ( सुपारी ) शिसवा, शिरीष.
**कपिचूडो वानीराख्यः** ( अरु. अहसू. १५.४१ )
जलवेतस, अंबाडा.
**आम्रातकः** ( हे. अहसू. १५.४१ ) अंबाडा.
**गन्धमुण्डः** ( चसू. ४.१५ ) एक वनस्पती.
**शिरीषः** ( ध. ५.११२ ) सिरस.
**पार्श्वपिप्पलः** ( चसू. २५.४९ ) एक वनस्पती.

**कपीलु**–पु., वनस्पति० काकतिन्दुकः ( रा. ११. ५२–५३ ध. ५.४१ )
टेंभुरणी, टेंभूर. काटे टेंभुर.

**कपीष्ट**–पु., वनस्पति० राजादनः ( ध. ५.९१ )
खिरणी, चारोळी.

**कपोत**–पु., प्रतुदपक्षि० पारावतः, स द्विविधः गृहवासी वनवासी च, वनवासी पाण्डुकः, गृहवासिमांसगुणाः–कषायं मधुरविपाकं विशदं शीतं रक्तपित्तनिबर्हणं ( चसू. २७.७२ ) वनवासिमांसगुणाः—गृहवासिकपोतमांसात्किञ्चिल्लघुतरं शीतं स्वल्पमूत्रकरं च (चसू. २७.७३) शिलाजतुमाक्षिकधातुभ्यां व्याप्तदेहः कुलत्थकपोतौ यावज्जीवं विवर्जयेत् ( सुचि. १३.१९ ) पाण्डुककपोतस्य पुरीषं पक्वशोथस्य विदारणं करोति ( सुसू. ३७.९–१० )
पक्षी, पारवा, कबूतर, होला, कवडा. प्रकार २—( १ ) घरगुती कबूतर—**मांस**–तुरट, रक्तपित्तनाशक, थंड, पाकानंतर मधुर, क्लेदनाशक ( २ )

**रानातला कबूतर** मांस–घरगुती कबुतरापेक्षा अधिक हलके, थंड; मूत्र कमी करणारे, शिलाजतु व माक्षिक खाणाऱ्याने जन्मभर कुळीथ व कबूतर वर्ज्य करावे. रानपारव्याची विष्ठा पिकलेल्या सुजेला फोडते.

**अष्टादशमूषिकेष्वेकः, एतद्विषतः संनिपातजा रोगा ग्रन्थयः कर्णिकाश्च भवन्ति** ( सुक. ७.६ असंउ. ४६ )

एक उंदीर. याच्या विषाने संन्निपात रोग, ग्रंथी होतात. आणि चकंदळे येतात.

कपोताभः ( सुनि. ६.२६ ) एक रंग.

न., **खनिज० अञ्जनम्** ( ध. ३.१५१ ) ( रा. १३.२१५ )

खाणीतले द्रव्य, डोळ्यात घालावयाचे अंजन. सुरमा.

**–चरणा**–स्त्री., **वनस्पति० नलिका** ( ध. ३.४३ ) देवनळ.

**–पङ्क्ता**–स्त्री., **वनस्पति० कपोतवङ्का, सुवर्चला** ( असंउ. ४. ) ब्राह्मी.

**–पुट**–न., **पुट० घटसंपुटितौषधाय भूमावष्टसंख्याकैर्वनच्छगणैर्दीयमानं पुटम्** ( र. १०.५८ ) औषध भाजण्याकरिता, ते ठेवलेल्या परळाच्या संपुटास जमिनीवर आठ रानशेणींनी दिलेले पुट.

**–पुरीष**–न., **कपोतशकृत्, विशेषतः पाण्डुकस्य पुरीषं पक्वशोथस्य दारणं करोति** ( सुसू. ३७.१० ) **श्लेष्माऽर्बुदे प्रलेपार्थमुपयुज्यते** ( असंउ. ३५; ( सुचि. १८.३६ )

कबूतराची विष्ठा. पिकलेली सूज फोडण्याकरिता व कफार्बुदावर लेप देण्याकरिता विशेषतः पांढऱ्या रानकबुतराची विष्ठा उपयुक्त.

**–बाणा**–स्त्री., **वनस्पति० नलिका** ( रा. १२.८८ ) गुलछबु, घेवडा.

**–वङ्का**–स्त्री., **वनस्पति० सुवर्चला** ( सुउ. ३२.३ ) ब्राह्मी.

**कटभीसदृशपत्रा विटपी मध्यदेशे प्रसिद्धा** ( सुचि. ७.२५ )

मालकांगोणीच्या पानांसारखी पाने असलेली वेल. ( मध्यप्रदेशात ) प्रसिद्ध.

**शिरीषसदृशपत्रः स्वल्पविटपः** ( सुसू. ३८.१२ ) शिरसाच्या पानासारखी पाने असलेले लहान झुडुप.

**–वर्णता**–स्त्री., **कपोतसदृशो नीलोऽरुणो वा वर्णः** ( सुसू. १२.८ )

कबूतराच्या वर्णासारखा निळा किंवा अरुण वर्ण असणे.

**–वर्णा**–स्त्री., **वनस्पति० सूक्ष्मैला** ( ध. २.४४ ) द्र० 'एला' लहान वेलदोडा.

**–वर्णी**–स्त्री., **वनस्पति० सूक्ष्मैला**, द्र० 'एला' ( रा. ६.६८ ) लहान वेलदोडा.

**–वल्ली**–स्त्री., **वनस्पति० सूक्ष्मैला** ( चवि. ८.१३९ ) द्र० 'एला' लहान वेलदोडा.

**–वेगा**–स्त्री., **वनस्पति० ब्राह्मी** ( ध. ४.१०० ) ब्राह्मी.

**–सार**–न., **खनिज० स्रोतोऽञ्जनम्** ( रा. १३.२२६ ) सुरम्याचा एक धातु.

**कपोतान्ध**—वि., **अरिष्ट लक्षण० "कपोतान्धस्तु रूपाणि दिवा कृष्णानि पश्यति"** ( चक्र. च. ३.६ ) एक मरणसूचक लक्षण. दिवसा सर्वत्र काळे पहातो.

**कपोताभ**–पु., **मूषिक०** ( सुक. ७.६ ) द्र० '**मूषिक**' उंदीर प्रकार. पहा 'मूषिक'.

**कपोल**—पु., **प्रत्यङ्ग० गल्लः** ( अहसू. १०.४ ) गाल.

**कफ**–पु., **दोष श्लेष्मा, केन जलेन के जले वा फलति वर्धते इति कफः । श्लेषणकर्मकरः पिच्छिलो देहधातुः** ( सुसू. २१.५ ) **रसस्य मलः** ( चचि. १५.१८ ) **शरीरस्थः सौम्यधातुः । उत्पत्तिः–अम्भःपृथिवीभ्यां कफः समुत्पद्यते** ( असंसू. २० ) **कफगुणाः–शीतो गुरुर्मन्दः स्निग्धः श्लक्ष्णो मृत्स्नः स्थिरः** ( अहसू. १.१२ ) **पटुर्मृदुर्गौल्यवाँश्च** ( रा. २१.८ ) **तत्स्थानानि उरःकण्ठशिरःक्लोमपर्वाण्यामाशयो रसः । मेदो घ्राणं जिह्वा च** ( अहसू. १२.३ ) **प्राकृतकर्माणि—स्नेहो बन्धः, स्थिरत्वं, गौरवं, वृषता, बलं, क्षमा, धृतिरलोभश्च** ( चसू. १८.५१ ) **तद्भेदाः स्थानानि च पञ्च–अवलम्बक उरसि, क्लेदक आमाशये, बोधको जिह्वामूले, तर्पकः शिरसि, श्लेषकः संधिषु तिष्ठति** ( अहसू. १२.१५–१८ ) **वृद्धिकालाः–बाल्ये, दिवसस्य निशायाश्च प्रथमे भागे, भुक्तस्य प्रथमकाले, तथैव वसन्ते कफवृद्धिर्भवति** ( अहसू. १.८ ) द्र० '**दोष**' पाण्याने किंवा पाण्यामध्ये वाढतो म्हणून कफ. एकमेकास जोडण्याचे–संयोगाचे कर्म करणारा. देहातील बुळबुळीत धातु, पाणी व पृथिवी या दोन महाभूतांपासून झालेला सौम्य धातु. रसधातूचा मल. गुण–शीत, स्निग्ध, जड, गुळगुळीत, बुळबुळीत, स्थिर, सौम्य, मऊ. गोड व लवण. **स्थाने**–उर, कंठ, शिर, आमाशय, पेरी, क्लोम, रस, मेद. नाक, जीभ,

इत्यादि. **स्वाभाविक कर्मे**–स्निग्ध, परस्परांना बांधणे, जोडणे, स्थिर करणे, जडता, शुक्रधातु पुष्टी, बल, क्षमा, धृति ( धैर्य ) लोभ नसणे. **कफाचे भेद व स्थाने**–अवलंबक उरस्थानात, क्लेदक आमाशयात, बोधक जिभेच्या मुळाशी, तर्पक शिरः-स्थानात, श्लेषक संधीमध्ये असतो.

**वाढीचा काल**–बाल्यावस्थेत, दिवसाच्या व रात्रीच्या पहिल्या भागात, जेवणानंतर, वसंतात कफवृद्धी होते.

**–घ्नी**–स्त्री., वनस्पति० हपुषा ( रा. ४.१३ ) शेरणी.

**–पूर्णदेह**–वि., रोगलक्षण० **कफस्य गौरवादिभिर्लक्षणैर्युक्तः** ( सुउ. ५२.९ )
रोगाचे एक लक्षण, कफाच्या जडपणा इत्यादी लक्षणांनी खूप त्रास होणे. कफाने भरलेले शरीर.

**–पूर्णास्यता** स्त्री., रोगलक्षणा० **कफपूर्णमुखता** ( अहृसू. २२.११ )
एक रोगलक्षण. तोंड कफाने भरलेले असणे.

**–प्रकृति** ( स्त्री., ) दोषप्रकृति० **दूर्वेन्दीवरसुवर्णगोरोचनशरकाण्डान्यतमवर्णः समसुविभक्तस्निग्धस्थिरसुकुमारश्लिष्टमांससन्धिबन्धः परिपूर्णचारुगात्रो महाललाटोरुबाहुर्व्यक्तसितासितप्रसन्नायतविशालपक्ष्मलाक्षः सिंहमृदङ्गघनघोषः, क्षुत्पिपासोष्णसहिष्णुः बह्वोजोबलशुक्रव्यवायापत्यश्चिरशोषमाल्यानुलेपनो बाल्येऽप्यरोदनः, पेशलः सत्यवादी, स्मृतिमान्, धृतिमान् अलोलुपः, कटुतिक्तकषायोष्णरूक्षेच्छोपशयश्च भवति** ( असंशा. ८.१५ ) **क्षुत्तृड्दुःखक्लेशघर्मैरतप्तः सात्विको धर्मात्मा, विनीतः प्रलम्बबाहुः पृथुपीनवक्षा घननीलकेशः प्रच्छन्नं, दृढं चिरं च वैरं दधानः। समदद्विरदेन्द्रतुल्ययातः स्वल्पभोज्यपि बलवान् सुस्निग्धविशालदीर्घसुव्यक्तशुक्लासितपक्ष्मलाक्षोऽल्पक्रोधो वदान्यः, क्षमावान् दीर्घदर्शी, दीर्घसूत्री, गम्भीरः कृतज्ञः ऋजुर्विपश्चित्सुभगसुलज्जो भक्तो गुरूणां, स्थिरसौहृदश्च ब्रह्मारुद्रेन्द्रवरुणतार्क्ष्यहंसगजसिंहाऽश्वगोसदृशवृत्तिः, स्वप्ने पद्मविहङ्गमालाजलाशयानां द्रष्टा** ( अहृशा. ३.९६–१०३ ) **प्रियदर्शनो मधुरप्रियश्च** ( सु. शा. ४.७२–७६ ) **श्लेष्मा हि स्निग्धश्लक्ष्णमृदुमधुरसारसान्द्रमंदस्तिमितगुरुशीतविज्जलाच्छः, तस्य स्नेहाच्छ्लेष्मलाः स्निग्धाङ्गाः श्लक्ष्णत्वाच्छ्लक्ष्णाङ्गाः मृदुत्वात् दृष्टिसुखसुकुमारावदातगात्राः, माधुर्यात्प्रभूतशुक्रव्यवायापत्याः, सारत्वात्सारसंहितस्थिरशरीराः, सान्द्रत्वादुपचितपरिपूर्णसर्वाङ्गाः, मन्दत्वान्मदचेष्टाहारव्याहाराः, स्तैमित्यादशीघ्रारम्भक्षोभविकाराः, गुरुत्वात्साराधिष्ठितावस्थितगतयः, शैत्यादल्पक्षुत्तृष्णासंतापस्वेददोषाः, विज्जलत्वात्सुश्लिष्टसारसंधिबन्धनाः, तथाऽच्छत्वात्प्रसन्नदर्शनाननाः प्रसन्नस्निग्धवर्णस्वराश्च भवन्ति, त एवंगुणयोगाच्छ्लेष्मला बलवन्तो वसुमन्तो विद्यावन्त ओजस्विनः शान्ता आयुष्मन्तश्च भवन्ति ।** ( चवि. ८.९६ )

कफदोषाची प्रकृती. दूर्वा, निळे कमळ. सोने गोरोचन, बाणगवताचे कांड यापैकी एकाच्या वर्णासारखा वर्ण; सर्वत्र सारखे व्यवस्थित विभागलेले दिसणारे, स्थिर, कोमल, भरलेले, एकमेकांस चिकटलेले मांस, व संधिबंधने, भरदार पण सुंदर अवयव, कपाळ, मांड्या, व हात मोठे; काळे बुबुळ व पांढरी कवडी अगदी स्पष्ट दिसणारे, लांबट व मोठे आणि पापण्याही मोठ्या असलेले प्रसन्न डोळे; सिंह, मृदंग, मेघ, यांच्या आवाजासारखा आवाज; भूक, तहान व ऊन्ह सहन करण्याची शक्ती, ओज, बल, शुक्र, स्त्रीसंभोग शक्ती व संतती पुष्कळ असलेला; ज्याच्या अंगाला लावलेला लेप, अंगावरची फुले लवकर सुकत नाहीत; जो लहानपणीही रडत नाही, जो सुंदर दिसतो, खरे बोलतो, ज्याची स्मरणशक्ती, धैर्य चांगले; जो आसक्त नसतो; ज्याला नेहमी कडु, तिखट, तुरट, उष्ण, रूक्ष पदार्थ खाण्याची इच्छा असते व ते खाल्ल्याने आरोग्य चांगले राहते असा. भूक, तहान, दुःख, कष्ट, ऊन्ह यांनी त्रास न होणारा सात्विक, धार्मिक, नम्र, लांब हातांचा. पसरट व पुष्ट छातीचा, दाट व काळ्या केसांचा. कोणालाही समजू शकणार नाही असे दीर्घकाळ पक्के वैर मनात ठेवणारा. मस्त गजराजासारखा चालणारा. अल्पाहारी असूनही बलवान्, कमी राग येणारा, गोड बोलणारा, क्षमाशील, दूरदृष्टीचा, कामाला वेळ लावणारा, खोल, कृतज्ञ, सरळ, पंडित, नशीबवान् मर्यादशील; गुरुभक्त, दृढ व दीर्घकाल मैत्री ठेवणारा ब्रह्मा, रुद्र, वरुण, गरुड, हंस, हत्ती, सिंह, घोडा, बैल यांच्या स्वभावाचा. स्वप्नात कमळे, पक्ष्यांचे थवे, जलाशय पाहणारा, कफ प्रकृतीचा असतो. तो दिसायला चांगला असतो. गोड

पदार्थांची आवड असणारा व स्वभावाचाही गोड असतो आणि लोकांना आवडतो ही. कफाच्या स्निग्धगुणाने तो स्निग्ध अंगाचा, चिकण गुणाने चिकण अंगाचा. असाच कफाच्या सर्व गुणांचा परिणाम कफप्रकृतीवर होतो. चरकाचार्यांनी हेच गुण सांगितलेले असल्यामुळे वरील मूळ संस्कृत वचनावरून द्विरुक्ति केली नाही. या गुणांमुळे कफ-प्रकृती मनुष्य बलवान्, श्रीमंत, गोड स्वभावाचा, विद्वान, ओजस्वी, शांत व आयुष्मान असतो.

**–प्रसेक**–पु., रोगलक्षण० **श्लेष्मणोऽतिप्रसेकेन वायुः श्लेष्माणमस्यति स कफप्रसेकः** ( चचि. ८.१२१ ) रोगाचे एक लक्षण. घशातून सारखा कफ पडणे. कफस्राव.

**–रक्तमूर्ति**–वि., **कफरक्तजः** ( सुनि. १६.३८ ) कफ व रक्तापासून झालेला. कफरक्तमय.

**–रक्तयोनि**–वि., **कफरक्तोत्पन्नः** ( सुनि. १६.३९ ) कफरक्तापासून उत्पन्न झालेला.

**–विरोधिन्**–न., वनस्पति० **मरिचम्** ( रा. ६.१३६ ) मिरे, एक वनस्पती.

**–संस्रव**–पु., रोगलक्षण० **कफस्रुतिः** ( सुउ. ५७.५ ) कफाचा स्राव.

**कफारि**–पु., वनस्पति० **शुण्ठी** ( रा. ६.१३० ) सुंठ. एक वनस्पती.

**कफान्तक**–पु., वनस्पति० **बर्बुरः** ( रा. ८.१२ ) बाभूळ, एक वनस्पती.

**कफावृति**–स्त्री., **कफावरणम्** ( चचि. ३.४१ ) कफाचे आवरण.

**कफाह्वय**–पु., वनस्पति० **कैडर्यनिम्बः** ( रा.९.४८ ) एक वनस्पती. पर्वतनिंब.

**कफाशय**–पु., **कफस्थानम्, आमाशयोर्ध्वभागभूतं वक्षः** ( चक्र. चचि. २०.२६ ) कफाचे स्थान, कफाचा आशय. आमाशयाचा ऊर्ध्वभाग. उरःस्थान.

**कबन्ध**–न., **जलम्** ( रा. १४.३१७ ) पाणी.

**कबरी**–स्त्री., वनस्पति० **हिङ्गुपत्री** ( ध. २.३८ ) बाभळी, रानतुळस, रक्तकण्हेर, कानफोडी, बाभूळ **केशबन्धः** ( रा. परि. १८.१८ ) वेणी. बुचडा.

**कमठ**–पु., जलचरप्राणि० **कच्छपः** ( र. ११.१२९ ) कासव. जमीन व पाणी यांत राहाणारा प्राणी.

**कमण्डलु**–पु., वनस्पति० **प्लक्षः** ( ध. ५.८१ ) पिंपरी. नांदरूख.

**कमल**–न., वनस्पति० **पुष्पभेदेन त्रिविधं श्वेतं रक्तं नीलं च** ( ध. ४.१५२ ) **गुणाः–शीतलं वर्ण्यं मधुरं कफपित्तजित् तृष्णादाहास्रविस्फोटविषवीसर्पनाशनम्** ( भा. प्र. )
हिं.—कमल.
म.—कमळ.
गु.—कमल.
बं.—पद्म.
ता.—तामरै.
एक वनस्पती. फुलावरून ३ प्रकार. तांबडे, पांढरे व निळे. **गुण**–थंड, वर्ण चांगला करणारे, गोड, कफपित्तनाशक, तहान, दाह, विस्फोट ( फोड ) धावरे आणि विष यांचे नाशक. रक्तदोषघ्न.
**ताम्रम्** ( र. २१.१३९ ) तांबे.
**जलम्** ( रा. १४.३१७ ) पाणी.

**कमलाविलासकरस**–पु., पारदयोग० **लोहाभ्रपारदगन्धकसुवर्णयुक्तः, पाण्डुहिक्कामन्दाग्निहलीमकसर्वप्रमेहनाशकः** ( र. २६.५१–५३ ) पारा असलेला एक योग. लोह, अभ्रक, पारा, गंधक, सुवर्णयुक्त योग. पांडुरोग, उचकी, अग्निमांद्य, उग्र कावीळ व सर्व प्रमेह हे रोग नष्ट करितो.

**कम्प**–पु., लक्षण० **वेपथुः, गात्रकम्पनम्** ( सुनि. १.२७ ) अवयव थरथर कापणे. एक लक्षण.

**–वात**–पु., वातरोग०लक्षणम्–**हस्तपादतलानां कम्पो भ्रमणं, निद्रानाशः बुद्धिक्षयः च** ( र. २१.१४७–४८ ) '**सर्वाङ्गकम्पः शिरसो वायुर्वेपथुसंज्ञकः**
एक वातरोग. हात पाय थरथर कापणे, फिरल्यासारखे वाटणे. झोप नाहीशी होणे व बुद्धिक्षय. डोक्यातही कंपवात नामक विकार.

**कम्पन**–न., लक्षण० **कम्पः** ( चइ. ७.२७ ) एक लक्षण. कापरे, हात, पाय, डोके कापणे.

**कम्पिल्ल**–पु., खनिजद्रव्य० **कम्पिल्लकः** ( र. ३.१३४ ) कपिला.

**कम्पिल्लक**–पु., वनस्पति० **रेचनगणोक्तं द्रव्यम्** ( च. वि. ८.१३६ ) **दद्रुकण्ड्वादित्वग्दोषेष्ववचूर्णनार्थम्** ( चसू. ३.१० ) **श्यामादिगणे गुल्मादिरोगहरम्** ( सुसू. ३८.२९ ) **कटुरुष्णो लघुः कफघ्नो व्रणगुल्मोदरविबन्धाध्मानकृमिकासजन्तु-**

**श्लेष्मोदरनुत्** ( ध. ३.१३८ ) **पित्तासृङ्मेहविषाश्मनुत्** ( भाप्र. )
हिं.—कवीला, कमीला, कमला.
म.—**कपिला, शेंद्री**
गु.—कपिलो.
बं.—कमिलागुडि, कमिल, कमलगुण्डी.
त.—चुवङ्गेचारि, कपिल पोडि.
का.—कनबेला.
एक वनस्पति. श्यामादि रेचकगणातील एक. गुल्मादिरोगनाशक; गजकर्ण, खाज इ. मध्ये वरून पूड भुरभुरण्यासाठी उपयोग. **गुण**-तिखट, उष्ण, हलकी, कफनाशक, व्रण, गुल्मज उदर, मळमूत्रसंचय, पोटफुगी, कृमी, खोकला, जंतु व कफोदर नाहीसे करते. रक्तस्राव, प्रमेह, विष व मूतखडा नाहीसा करते.
**खनिजद्रव्य० साधारणरसेष्वेकः, इष्टिकाचूर्णसंकाशश्चन्द्रिकाढ्यः सौराष्ट्रदेशोत्पन्नः, गुणाः–पित्तव्रणाध्मानविबंधहारी श्लेष्मोदरार्तिगुल्मकृमिनाशकः, मूलामशोफशूलज्वरघ्नोऽतिरेचनश्च** ( र. ३.१३६–१३७ )
एक खनिजद्रव्य० साधारण रसांपैकी एक. विटेच्या चूर्णासारखे चमकणारे काठेवाडमध्ये सांपडणारे द्रव्य. **गुण**—पित्तज व्रण; पोटफुगी, मलमूत्रांचा विबंध, कफोदर, गुल्म, कृमी, आम, सूज, शूळ, ज्वरनाशक व तीव्ररेचक आहे.

**–तैल**–न., **फलतैल० गुणाः–कटु, कटुविपाकमुष्णं तीक्ष्णं, लघु, सरं, वातकफघ्नं कृमिकुष्ठप्रमेहशिरोरोगापहरं च** ( सुसू. ४५.११५ )
कपिलेचे तेल ( फळाचे ) **गुण**—तिखट व तिखट विपाक, उष्ण, तीक्ष्ण, हलके, सारक, वातकफनाशक, कृमि, कुष्ठ, प्रमेह व डोक्याचे रोग नाशक.

**–स्नेह**–पु., **तैल० तिक्तकटुकषायस्नेहेष्वेको दुष्टव्रणविशोधनः, अधोभागदोषहरः, कफवातहरः कृमिघ्नश्च** ( सुसू. ४५.१२४ )
कपिलेचे तेल ( झाडाचे ) कडू तिखट, तुरट तेलांपैकी एक. दुष्टव्रणाची शुद्धी करणारे, वातकफनाशक, कृमी व खालच्या भागातले दोष हरण करणारे.

**कम्बल**–पु., **ऊर्णावस्त्रम्** ( असंसू. ४ ) लोकरीचे वस्त्र.

**कम्बलि**–पु., **ऋषि० सप्तविंशतिसंख्याकेष्वन्यतमो रससिद्धिप्रदायकः** ( र. १.२–५ )
एक ऋषि. रससिद्धि करणाऱ्या २७ ऋषींपैकी एक.

**कम्बा**–स्त्री., **शलाका** ( र. ७.१२ ) सळई.

**कम्बु**–पु., **जांगमद्रव्य० शङ्खः** ( ध. ३.१७९ )
शंख. प्राणिजद्रव्य०

**–काष्ठा**–स्त्री., **वनस्पति० अश्वगन्धा** ( रा. ४.४०० )
आसकंद. एक वनस्पती.

**–पुष्पी**–स्त्री., **वनस्पति, शङ्खपुष्पी** ( ध. ४.११३ )
एक वनस्पती. शंखपुष्पी, सांखवेल.

**–पूत**–पु., **जांगमद्रव्य० शङ्खः** ( रा. १३.२४३ )
प्राणिज द्रव्य, शंख.

**मालिनी**–स्त्री., **वनस्पति० शङ्खपुष्पी** (ध. ४.११३)
एक वनस्पती. शंखपुष्पी. सांखवेल.

**कम्बुकी**–स्त्री., **वनस्पति० अश्वगन्धा** (र. ११. ५३–५७)
एक वनस्पती, आसकंद.

**कम्भारी**–स्त्री., **वनस्पति० काश्मरी** ( रा. ९.१४६ )
एक वनस्पती. शिवण.

**कम्भिका**–स्त्री., **धान्य० व्रीहिः** ( रा. १६.११७ )
एक धान्य, तांदूळ प्रकार.

**कर**–पु.,**प्रत्यङ्ग० हस्तः** ( अहसू. २५.४० )
( सुचि. ३८.४० ) **द्र० 'हस्त'**
उपअवयव. हात. पहा 'हस्त.'

**–घाट**–पु., **वनस्पति० मदनः** ( असंउ. ४४ )
एक वनस्पती. गेळ. गेळफळ.
**मूलविष० यस्य त्वचि निर्यासे मूले च विषं वर्तते** ( सुक. २.५ )
एक विषारी मूळ. जिच्या सालीत डिंकात व मुळात विष असते ती वनस्पती.
**देश० करहाटः, स्कान्दे सह्याद्रिखण्डे काराष्ट्रदेशस्य राजधानी, सांप्रतं 'कराड' इति प्रसिद्धः** ( काखिल. २५.१४ )
कऱ्हाड. काराष्ट्र देशाची राजधानी.

**–च्छद**–पु., **वनस्पति सागः** ( धपरि. ५.३ )
एक वनस्पती. साग.
**सिन्दूरी सिन्दूरपुष्पी** ( रापरि. १०.१९ )
एक वनस्पती.

**–ज**–पु., **शारीर० नखः** ( चशा. ८.५१ )
शारीर. नख.
**वनस्पति० करञ्जः** ( चसू. ३.१३ ) करंज.
**नखम्** ( ध. ३.५८ )
नखला, एक सुगंधी द्रव्य.

**-जोडि**-पु., कन्द० **रसबन्धादिवश्यकृत्** (रापरि.७.५७)
एक कंद. पाऱ्याचे बंधन इत्यादी कार्य करणारा.

**-पत्र**-न., शस्त्र० **खरधारं दशाङ्गुलदीर्घं, विस्तारे-द्वयङ्गुलं सूक्ष्मदन्तं सुत्सरुबन्धमस्थ्नां छेदोपयोगि** (अहृसू. २६.१६)
खरखरीत धारेचे, दहा अंगुळे लांब, २ अंगुळे रुंद, बारीक दाते असून घट्ट मूठ असलेले असे एक शस्त्र. करवत. हाड कापण्याकरिता उपयुक्त.

**-पत्रिका**-स्त्री. **प्रसहपक्षि०** (ड. सुसू. ४६.७४)
भक्ष्यावर आक्रमण करून खाणारा एक पक्षी.

**-पर्ण**-पु., वनस्पति० **रक्तैरण्डः** (रा. ८.४४७)
द्र० 'एरण्ड' एक वनस्पती. तांबडा एरंड.

**-( पर्णी )**-स्त्री., वनस्पति० **भेण्डा** (रा. ४.२६)
एक वनस्पति. भेंडा.

**-पाददाह**-पु., लक्षण० **करयोः पादयोश्च दाहः** (चचि. ६.१४)
एक लक्षण. हात व पाय यांचा दाह.

**-प्रचित**-वि., **करेण कराभ्यां वा संचितम्** (चचि.१८. (३) ३)
हाताने संचित केलेले. हाताने गोळा केलेले.

**-प्रचितीय**-पु., अध्यायपाद० (चचि. १ (३) १)
अध्यायाचे नांव. यात हाताने तोडलेल्या आवळयाच्या रसायन प्रयोगाचा विधी आहे.

**-प्राप्य**-वि., **हस्तग्राह्यम्** (अहृसू. २८.२२)
हस्तगत होण्यासारखे.

**-भु**-पु., पशु० **रोहिणः** (रापरि. ६.३४)
एक पशु. गवा. रानगाय. तांबडी गाय.

**-मर्द**-पु., न., वनस्पति० **तद्द्विविधम्-ग्रामजं वनजं चेति, आमं तु दीपनं दाहकरम्** (ध. ५.१०३) **कृष्णवर्णद्राक्षारूपं बीजबहुलमम्लमधुरं वन्यं फलम्** (र. १०.८०-८१) **तत्त्वम्लं रक्तपित्तकरम्** (चसू. २७.१६१) **तत्तृषापहं रुच्यं पित्तकृत्** (सुसू. ४६.१५६)
**आर्द्रं करमर्दं कफपित्तप्रदं सरं गुरूष्णं वातघ्नम्** (असंसू. ७.२०३)
**पक्वं करमर्दं मधुरं शीतं पित्तघ्नमरुचिरक्तपित्तघ्नम्** (ध. ५.१०३)
**त्रिदोषघ्नं विषघ्नम्** (रा. ५.१६९)
हिं.—करोन्दा.
**म.—करवन्द.**
गु.—करमदा.



बं.—करम्चा.
ता.—पेरु कळाचेटि.
एक वनस्पती. प्रकार २. गांवठी व रानातले. **कच्चे**-अग्निदीपक, सारक, जड, उष्ण, वातघ्न, कफपित्त-वर्धक पण दाह करते. **रानफल**-आंबट गोड, आंबट, रक्तपित्तकर, रुचकर, तहान कमी करणारे. **पक्व**-गोड, थंड, पित्तनाशक, रक्तपित्तनाशक, त्रिदोषनाशक, विषनाशक, रुचकर.

**-मर्दिका**-स्त्री., वनस्पति० **द्राक्षा** (ध. ५.५६)
द्राक्ष.

**-रुह**-पु., वनस्पति० **नखः** (घ. ३.५८)
नखला, सुगंधी द्रव्य.

**-वन्द**-न., वनस्पति० **करमर्दः** (र. १०.८०-८१)
करवंद.

**-वीर**-पु., वनस्पति० **उपविषेष्वेकम्, स श्वेतरक्त-पीतकृष्णपुष्पभेदाच्चतुर्विधः** (सुचि. १९.३७-३९) **कटुस्तिक्तः कषायमधुरः** (सुसू. ३८.६५) **उष्ण-श्चक्षुष्योऽश्वमारणो ज्वरकुष्ठकण्डूविषव्रणस्फोटघ्नः** (ध. ४.१)
**कुष्ठघ्नगणे** (चसू. ४.११) **किक्किसोत्पत्तिकाले कण्डूप्रशमनार्थं करवीरसिद्धतैलेनाभ्यङ्गः** (चशा. ८.३२)
**अस्य कषायाणि व्रणशोधनानि** (सुसू. ३७.१३-१४) **त्वगस्य दद्रुघ्ना, पत्राण्यस्य व्रणप्रक्षालने उपयुज्यन्ते** (सुचि. १९.३७-३९)
**पुष्पमस्य जलगन्धनाशनम्** (असंसू. ६) **मूलमस्य शिरोविरेचने उपयुक्तम्** (सुसू. ३९.६) **तथा च कुष्ठनिषूदनलेपे उपयुक्तम्** (चसू. ३.१५)
हिं.—कनेर, कनैली.
**म.—कण्हेर.**
गु.—कणेर.
बं.—करवी.
ता.—मलै अलरी, अयमरम्.
एक वनस्पती. एक उपविष. फुलांवरून चार प्रकार, पांढरी, काळी, तांबडी व पिवळी. तिखट, कडु, तुरट, गोड, उष्ण, पण डोळ्याला हितकर. घोड्याला घातक, ज्वर, कुष्ठ, कण्डू, विष, फोड, व्रण, यांचा नाश करते. गर्भिणीच्या जांघेत पांढऱ्या रेषा उठतात त्यांना **किक्कस** म्हणतात. त्यावेळी येणारी खाज नाशक; **साल**-गजकर्णनाशक; **पाने**-व्रण धुण्यास, **फूल**-पाण्याचा दुर्गंध नाशक; **मूळ**-चूर्ण

नाकात हुंगण्यास ( डोकेदुखीवर ) कुष्टावर लेप देण्यास.

**सोम०** ( सुचि. २९.६ ) सोमाचा एक प्रकार.

**अर्जुनवृक्षः** ( वैशसि. ) अर्जुनसादडा.

**–वीरकन्द–**पु., वनस्पति० **तैलकन्दः** ( रापरि. ७.५० ) एक कंद. तेल्याकंद.

**–वीरभुजा–**स्त्री., वनस्पति० **आढकी** ( ध. ६.९३ ) एक वनस्पती. तूर.

**–वीर्य–**पु., **धन्वन्तरिशिष्येष्वेकः** ( सुसू. १.३ ) धन्वन्तरीचा एक शिष्य.

**–हाट–**पु., वनस्पति० **कमलकन्दः** ( र. २७.११७ ) कमळाचा कन्द.

**मरुबकः** ( र. २७.११७ ) जंबीर; ईडनिंबु.

**आकारकरभः** ( र. २७.११७ ) अक्कलकाढा.

**मदनः** ( चचि. २६.१५. चक्र. १.२७ ) ( सुचि. १८.४५ ) गेळफळ, गेळा, एक वनस्पती.

**महापिण्डीतरुः** ( रा. परि. ९.३३ ) एक वनस्पती गेळफळ.

**–हाटक–**न., वनस्पति० **पद्मकन्दः** ( ध. ४.१६३ ) कमळाचा कंद.

**(–हाटिका–)** स्त्री., **मूषा** ( र. १०.१ ) मूस.

**करक–**पु., वनस्पति० **बकुलः** ( रा. १०.२६३ ) बकुळ.

वनस्पति० **दाडिमः** ( ध. २.६१ ) डाळिंब.

वनस्पति० **अस्य त्वक्सारनिर्यासः विषरूपः** ( असंउ. ४० ) एक विषारी वनस्पती याची साल, डिंक, नार ( गाभा ) विषारी.

वनस्पति० **करीरः** ( रा. ८.१६६ ) बांबूचा कोंब.

वनस्पति० **कोविदारः** ( रा. १०.२९३ ) कांचन.

पक्षि० **रणगृध्रः** ( ध. ६.३३ ) लांब कानाचे गिधाड.

**( करका )**–स्त्री., वनस्पति० **कारवल्ली** ( त्रपुसविशेषः ) ( रा. ७.२७८ ) एक वनस्पती. कारले.

**वर्षोपलः** ( अमरकोश ) पाण्याची गार.

**करङ्कशालि–**पु., वनस्पति० **इक्षुः** (रा. १४.१८५) ऊस.

**करञ्ज–**पु., वनस्पति० **गुणाः–तिक्तः कटूष्णस्तीक्ष्णो लघुश्चक्षुष्यो वातकफापहः पित्तघ्नः, कुष्ठोदावर्त-गुल्मार्शोनुत्** ( भाप्र. ) **रक्तपित्तनुत्** ( सुउ. ४५.२५ ) **जन्तुप्रमेहनुत्** ( सुसू. ४६.१९७–९८ ) **रक्तदोषव्रणप्लीहवृद्धिकृमिभूतयोनिरोगघ्नः** ( रा. ५.१०७ ) **फलम्–अस्थिबीजं स्नेहयुक्तम्** ( चसू. १३.१० ) **कृमिहरम्** ( चवि. ७.१७ ) **कफवातघ्नं प्रमेहार्शःकृमिकुष्ठघ्नं च** ( भाप्र. पूर्वखण्डः ) **विष्टम्भि पित्तश्लेष्माविरोधि च,** (असंसू. ७) **काष्ठम् दन्तविशोधने उपयुज्यते,** ( चसू. ५.७३ ) **त्वक्–व्रणे सेकलेपार्थं हिता,** ( अहसू. २९.७६ ) **पत्रम्–कटुपाकमुष्णलघुभेदनं कफवातघ्नं पित्तलमर्शःकृमिशोथहरम्, पुष्पम्–उष्णवीर्यं वातकफघ्नं च,** ( भाप्र. ) **मूलम्–शिरोविरेचनार्थम्** ( सुसू. ३९.६ ) **अङ्कुराः–अग्निदीपना रसे पाके च कटुकाः पाचनाः कफवातार्शः-कुष्ठकृमिविषघ्नाः शोथहराश्च** ( वैशसिं. )

हिं.—करंज, कंजा.

**म.—करंज.**

बं.—करंचा, धारकरानिआ, नाटा करञ्ज.

गु.—करंज.

ता.—पंकुमरम्, पुंगम्मारम्.

**गुण**–कडु, तिखट, उष्ण, तीक्ष्ण, हलका, डोळ्याला हितकारक, वातकफनाशक, पित्ताला अविरोधि, पोटफुगी, गुल्म, मूळव्याध, कुष्ठ, रक्तपित्त, कृमी, प्रमेह, रक्तदोष, व्रण, प्लीहावाढ, व भूतविकार नाहीसे करतो. **फळ**–स्नेहयुक्त बीजाचे कफवातघ्न, प्रमेह, मूळव्याध, कृमी, कुष्ठ यांचे नाशक, मलावष्टंभक आहे. **काडी**–दात घासण्यास उपयुक्त. **साल**–व्रणावर शेकणे व लेपासाठी. **पाने**–कटुविपाकी, उष्ण, लघु, भेदन, कफवातहर, पित्तकर, मूळव्याध, कृमी, व सूजनाशक. **फूल**–उष्ण, वातकफनाशक. **मूळ**–शिरोविरेचनासाठी उपयुक्त. **अंकुर**–तिखट, अग्निदीपक, पाचक, पाकाने तिखट. शिवाय वरील सामान्यगुण.

**करञ्जिका–**स्त्री., वनस्पति० **नक्तमालः, करञ्जभेदः, क्षारागदे आवापार्थमुपयुज्यते** ( सुक. ६.३ ) करंजाचा एक प्रकार. क्षारागद तयार करताना आवाप म्हणून घालण्यास उपयुक्त.

**–तैल–**न., तैल० ( चसू. १३.१० ) **गुणाः तिक्तं नात्युष्णम्** ( असंसू. ६. ) **अनिलकफकृमिकुष्ठ-प्रमेहशिरोरोगापहारि** ( सुसू. ४५.११५ ) करंजाचे तेल; पहा 'करञ्ज'

**–द्वय–**न., **आरग्वधादिगणे अर्कादिगणे च** ( सुसू. ३८.६–७; सुसू. १६.१७ )

एकश्चिरबिल्वो द्वितीयः कण्टकी विटपकरञ्जः (सुसू. ३८.६-७)

दोन्ही करंज. करंज व करंजिका.

**करट**-पु., धान्य० रूक्षणात्मकः (रा. ६.१०९)

एक धान्य. रूक्षता करणारे.

**करण**-न., कार्याभिनिवृत्तौ प्रयतमानस्य कर्तुरुपकरणाय यत्कल्प्यते तत्करणम् (चवि. ८.७०)

साधनम् (र. ७.८)

उपकरण, साधन, कार्य करताना, ते करणारा कर्ता साधन म्हणून ज्याचा उपयोग करतो ते.

असाधारणं कारणम् (तर्कसंग्रहः) व्यापारवद् असाधारणं कारणं करणम् (परमलघुमञ्जूषा)

इन्द्रियम् (चशा. १.५४-५६) (सुशा. ४.३७)

इंद्रिय; कान, नाक, इत्यादी.

ज्योतिःशास्त्रीयसंज्ञा० दिनभागभेदः अर्धतिथिः (चसू. १५.९)

बवबालवादि (सुसू. २.४)

ज्योतिःशास्त्रातील एक नाव. दिवसाच्या भागाचा प्रकार. अर्धी तिथि. बव, बालव इत्यादी नावे त्यांची आहेत.

स्वाभाविकद्रव्याणामभिसंस्कारः (चवि. १.२२ (२)

मूळच्या-स्वाभाविक-नैसर्गिक द्रव्यांवर केलेला संस्कार.

**-प्रात** वि., स्वकर्मणि युक्तः निपुणः (सुसू. ८.१९)

स्वतःच्या कर्मामध्ये कुशल. तरबेज; ज्ञाता.

**करणायतन**-न., बुद्धीन्द्रियकर्मेन्द्रियमनोबुद्ध्यहङ्कारस्थानानि (सुउ. ४६.४)

ज्ञानेंद्रिये, कर्मेंद्रिये, मन, बुद्धी, अहंकार यांचे स्थान. (हृदय)

**करण्डक**-पु., पात्र० हस्तिदन्तादिनिर्मितकरण्डः (र. १७.७८-८१)

करंडा. हस्तिदंत, चांदी, सोने इत्यादीचा बनविलेला.

**करण्डफलक**-पु., वनस्पति० कपित्थः (रा. ११.१५५.)

कवठ. एक वनस्पती.

**करभ** पु., प्राणि० उष्ट्रः (सुउ. ६०.४१) उंट.

प्रत्यङ्ग० मणिबन्धात् कनिष्ठिकापर्यन्तो हस्तबहिर्भागः (वैशसि) मणिबन्धादाकनिष्ठं करस्य करभो बहिः।

शरीराच्या एका अंगाचे प्रत्यंग. मनगटापासून कनिष्ठिके पर्यंतचा बाहेरचा भाग.

**(करभा)** स्त्री., वनस्पति० वृश्चिकाली (रा. परि. ९.८)

विंचवी.

**-काण्डिका** स्त्री., वनस्पति० उष्ट्रकाण्डी (रा. परि. १०.४३)

उटकटारी, उत्कटारी, नावाची वनस्पती माथाशूळ (लाल फुलांची)

**-प्रिया** स्त्री., वनस्पति० क्षुद्रदुरालम्भा, द्र० 'धन्वयास' (रा. ३.२३)

एक वनस्पती. छोटा धमासा. पहा 'धमासा.'

**-वल्लभ** पु., वनस्पति० पीलुः (ध. ५.५१)

पीलू. एक वनस्पती.

कपित्थः (रा. ११.१५५) कवठ.

**करभादनिका** स्त्री., वनस्पति० क्षुद्रदुरालम्भा (रा. ३.२३) द्र० 'धन्वयास'

एक वनस्पती. लहान धमासा. पहा 'धमासा'

**करभादिका**-स्त्री., मूषा (र. १०.१)

मूस. धातु पातळ करण्याची.

**करभीक्षीर**-न., उष्ट्रीक्षीरम् (असंचि. १९.१०६) द्र० "उष्ट्र"

उंटिणीचे दूध. पहा "उष्ट्र"

**करम्भ**-पु., वनस्पति. उत्तमारणी (अहसू. १५.२४)

एक वनस्पती. उत्तम अरणी, मोठी टाकळी, पांढरी टाकळी.

स्थावरविषभेदः, यस्य पत्रं, फलं, पुष्पं, त्वक्सारनिर्यासश्च सर्वं विषमयं भवति (सुक. २.५)

वनस्पतिज विषप्रकार. ज्याचे पान, फळ, फूल, साल, शिरा, काढा, डिंक, सर्व विषारी असतात.

**(करम्भा)**-स्त्री., वनस्पति० इन्दीवरी (रा. परि. ३.२७)

उतरण, वाघांटी, गव्हला.

**कराम्ल**-पु., न., वनस्पति० करमर्दः (ध., ५.१०२)

एक वनस्पती. करवंद.

**कराल**-पु., धान्य० मधुरः शीतो गुरुर्ग्राही वातलो रुच्यः कफपित्तघ्नः (ध. ६,१०९)

एक धान्य. मधुर, थंड, जड, मळ बांधणारे. वातवर्धक, कफपित्तनाशक, रुचकर.

वनस्पति० शालुकः, कृष्णार्जकः (ध. ४.५६)

एक वनस्पती. काळा अजवला.

जङ्गाल० हिमवदादिपर्वतेषु दृश्यते, 'कस्तूरीमृगः' (सुसू. २०.५)

जांघा; मांड्या, पुष्ट व मोठ्या असतात तो कस्तूरी मृग. हिमालय इत्यादी पर्वतावर आढळतो.
**अधोनिष्क्रान्तदन्तोऽयम्** ( सुसू. ४६.५४ )
खाली व बाहेर आलेल्या दांताचा
वि., **दन्तुरः, उन्नतदन्तः** ( सुशा. १०.२५ )
ज्याच्या दाताच्या टोकाला कातरे आहेत असा; दात पुढे आलेला.
**दन्तरोग० अश्लिष्टविकटानां दन्तानां प्रादुर्भावः** ( असंउ. २५ )
दाताचा एक विकार. यात लहान मोठे व अव्यवस्थित दात असतात.

**करिन्**–पु., **हस्ती** ( रा. ६.११६ ) हत्ती. गज.

**( करिणी )**–स्त्री., **कणभ० सविषकीटभेदः** ( सुक. ८.२६–२७ )
विषारी किड्याचा एक प्रकार.
**वनस्पति० हस्तिशुण्डी** ( र. १६.९९–१०२ )
हत्तीच्या सोंडेसारखा तुरा असलेली वनस्पती.
**गजपिप्पली** ( र. १६.९९–१०२ ) गजपिंपळी.
**इन्द्रवारुणी** ( र. १६.९९–१०२ )
कवंडळ. इन्द्रावण.

**( करि– ) कणा**–स्त्री., **वनस्पति० गजपिप्पली** ( ध. २.७८ ) गजपिंपळी. एक वनस्पती.
**चविका** ( रा. ६.११५ ) चवक.

**–पत्र**–न., **वनस्पति० तालीसपत्रम्** ( रा. ६.८२ )
एक वनस्पती. तालीस पत्र.

**–पुट**–न., **गजपुटम्** ( र. २२.२४–२९ )
एक हात लांबी, रुंदी आणि खोलीच्या खड्ड्यात औषध, रानशेण्या किंवा इतर योग्य जळणात ठेवून अग्नि देणे, भाजणे, जाळणे.
वरील प्रमाणे सव्वा हात मापाचेही गजपुट होते.

**–विजयभू**–स्त्री., **वनस्पति० आटरूषः** ( र. १७.६७–६८ )
एक वनस्पती. अडुळसा; वासा.
**नागदमनी**, ( र. १७.६७–६८ )
वनस्पती० नागदवणा.

**करिल्लका**–स्त्री., **वनस्पति० कारवल्ली** ( रा. ७.२७ )
वनस्पति. कारले.

**करीर**–पु., **वनस्पति० मरुजो द्रुमः** ( चचि. ३०.८२; चसू. २७.१४ ) **उष्ट्रप्रियः, गुडपत्रवृक्षः** ( सुसू. ४६.२८३ ) **अयं निष्पत्रकः ग्रन्थिलस्तीक्ष्णकण्टको वृक्षः** ( रा. ८.१६६ ) **गुणाः–कटुः स्वादुस्तिक्त उष्णो रुच्यः आध्मानकरः कफकरः** ( रा. ) **वातकफघ्नो गुदकीलारोचकश्वासशूलछर्दिखर्जूव्रणघ्नः ।** ( ध. ५.९९ ) **पुष्पं शाकत्वेनोपयुज्यते, शाकगुणाः–पाके कटु वातहरं सृष्टमूत्रपुरीषं च** ( सुसू. ४६. २८३ ) **फलम्–सकषायं मधुरं शीतं पित्तकफघ्नं च** ( चसू. २७.१४२ ) **करीरफलोद्भवतैलगुणाः–एतत्तैलं रसकर्मोपयोगि** ( र. १०.७३–७६ )
हिं.—कचरा, कवरा, करेर.
म.—नेपती.
गु.—केरडी.
बं.—करील, कचरा.
ता.—कर्याल.
फा.—कुराका, केविर.
नेपती, नेवती. एक वनस्पती. बरड जमिनीच्या देशात होते. वैराण रानात होणारी, उंटाला आवडणारी. पाने नसलेली, काटे असलेली गाठाळ वनस्पती. गुण–गोड, कडू, तिखट, उष्ण, रुचीला हितकर, पोट फुगवते. वातकफनाशक, मूळव्याध, श्वास, शूल, ओकारी, खरूज, व व्रणनाशक.
**फूलभाजी**–तिखट, वातनाशक, मळमूत्र साफ करणारी. **फळ**–गोड, थोडे तुरट, थंड व पित्तकफनाशक. **फळाचे तेल**–पारदक्रियात उपयुक्त.
**वंशाङ्कुरः** ( चचि. १४.१० ) **संयोगतः पयसा सह विषतुल्यं भवति** ( सुसू. २०.८ )
बांबूचे कोंब. दुधाबरोबर विषारी.
**उपोदिकाचञ्चवादीनां कोमलो नालः** ( सुचि. १.४१ )
एरंड, थोर मयाळ, राजगिरा इत्यादींचा कोमळ नाळ.
**मांसांकुरः** ( सुनि. २.१७ ) मांसाचे अंकुर.
**एक अनुशस्त्र. अंकुरः** ( सुसू. ८.१५ )
एक अनुशस्त्र. तीक्ष्ण टोकाचा कडक कोंब.

**–ग्रन्थिल**–पु., **वनस्पति० करीरः** ( रा. ८.१६६ )
एक वनस्पती० नेवती. नेपती.

**करीशिफा**–स्त्री., **वनस्पति० गजपिप्पलीमूलम्** ( र. १४.५३–५४ )
एक वनस्पति० गजपिंपळीचे मूळ.

**करीष**–पु. न. **शुष्कगोमयम्** ( चसू. १४.२६ )
**गवादिशकृच्चूर्णम्** ( अहसू. १७.६ )
सुकलेली शेणी. गाई-म्हशींच्या शेणाचे चूर्ण.

**करुणवेदिन्**–वि., **करुणया सत्त्वानि वेदयतेऽनुभवति पश्यतीति** ( चचि. १ ( ४ ) ३२ ).

दयार्द्र दृष्टीने प्राण्यांकडे पहातो, अनुभवतो, वागतो, त्यांच्या भावना जाणतो असा.

**करुणी**– स्त्री., वनस्पति० **ग्रीष्मकाले पुष्पयुक्ता; पुष्पं रक्तवर्णम्, तद्गुणाः कटुतिक्तोष्णा वातकफघ्नी, आध्मानविषविट्च्छर्दिजत्रूर्ध्वरोगश्वासहारिणी च** (रा. परि. १०.२७–२८)

एक वनस्पती. उन्हाळ्यात लाल फुले येणारी. **गुण**– तिखट, कडु, उष्ण, वातकफनाशक, पोटफुगी, विष, विष्ठेची ओकारी, खांद्याच्या वरचे रोग व श्वास-नाशक.

**करेणु**–स्त्री., पशु० **हस्तिनी** (सुसू. ४५.४७)

एक पशु. हत्तीण.

**वनस्पति० सोमसमवीर्या महौषधिः, काश्मीरे क्षुद्रमानससरसि भवति** (सु. चि. ३०.५)

एक वनस्पती० सोम या वनस्पतीसारखी कार्यकारी महत्वाची औषधी; काश्मीरमध्ये लहान मानस सरोवरात सापडते.

**करेणुका**–स्त्री., पशु० **हस्तिनी** (असंचि. ९)

एक पशु. हत्तीण.

**करेवर**–पु., धूप० **तुरुष्कः** (रा. १२.३७) ऊद, धूप.

**कर्क**–पु., वनस्पति० **आमलक** (रा. ११.२३१)

एक वनस्पती. आवळा.

**कर्कट**–पु., वनस्पति० **क्षुद्रामलकः, गुणाः–कषायः शीतो लघुः रुच्यो दीपनो ग्राही चक्षुष्यः कफपित्तघ्नः** (रा. ११.२३१)

म० लहान आवळा. गुण–तुरट, कफपित्तनाशक, रुचकर, थंड, हलका, अग्निदीपक, मळ बांधणारा, डोळ्याला हितकर.

**बिल्वः** (ध. १.१०६) बेल.

**कर्कटशृङ्गी** (र. १७.४८–५०) काकडशिंगी.

**प्राणि० कर्कटकः** (अहसू. ६.५२)

एक प्राणी, खेकडा.

न., **विषम्, इदं कपिवर्णम्** (र. २९.१५)

एक विष; हे पिंगट वर्णाचे असते.

**–शृङ्गी**–स्त्री., वनस्पति० **हिमालये वृक्षविशेषस्य पर्णेषु शाखासु च संस्थितानि क्षुद्रकीटकजन्यानि शृङ्गाकृतीनि लघुगोलकानि कर्कटशृङ्गीति नाम्ना प्रसिद्धानि सन्ति, गुणाः–तिक्तोष्णा वातपित्तघ्नी कासश्वासयक्ष्मोर्ध्ववातवान्तितृष्णारुचिज्वरहिकातिसाररक्तपित्तनाशिनी** (ध. १.८५)

हिं.—काकडाशिंगी.
म.—काकडशिंगी.
बं—काकडाशृङ्गी.
गु.—काकडाशिंगी.
ता—कक्कटाशिंगी.

हिमालयातील एका जातीच्या झाडावर लहान किड्यांनी शिंगासारखी लहान गोलसर केलेली घरटी. एक प्राणिज द्रव्य. **गुण**–कडु, उष्ण, व वातपित्त शामक ही खोकला, दमा, क्षय, ऊर्ध्ववात, वांती, तहान, रुचिनाश, ताप, उचकी, अतिसार व रक्तस्रावनाशक आहे. लहान मुलांना अधिक उपयोगी.

**कर्कटक**–पु., जलचरप्राणि० **कर्कटः** (चसू. २७.४०)

**स द्विविधः कृष्णशुक्लभेदेन पादिवर्गे एकः** (सुसू. ४६.१०९–११०) **'खेकडा' इति मराठी-भाषायाम् ।**

पाण्यातला पाय असलेला एक प्राणी. खेकडा काळा व पांढरा दोन प्रकारचा.

न., **कन्दविष०**, (सु. क. २.५)

**लक्षणम्–अन्यसेवनाद् उत्पतति हसति दन्ताँश्च दशति** (सुक. २.१८).

एक कंद विष. लक्षण–याच्या सेवनाने उड्या मारणे, हासणे, दांत खाणे इत्यादी लक्षणे होतात.

**अस्थिभग्न० कर्कटसदृशमस्थिभग्नम्, लक्षणम्–समूढमुभयतोऽस्थिमध्ये भग्नं ग्रन्थिरिवोन्नतं कर्कटम्** (सुनि. १५.१०)

हाड तुटण्याचा एक प्रकार. गाठी सारखा तुटलेल्या हाडाचा तुकडा वर आलेला असतो. दोन बाजूला तुटल्यामुळे मधला तुकडा वर येतो तो प्रकार.

**( कर्कटिका )**–स्त्री., फल० **कर्कटी** (र. ३०.३४)

एक फळ. काकडी.

**वनस्पति० त्रपुसम्** (ध. १.१७५)

तवसे, तिवसे, एक फळ, काकडी प्रकार.

**कर्कटकिनी**–स्त्री., वनस्पति० **दारुहरिद्रा** (रा. ६.८५)

एक वनस्पती. दारुहळद.

**कर्कटाख्या**–स्त्री., वनस्पति० **कर्कटशृङ्गी** (चचि. २८.१६०)

एक वनस्पती. पहा 'कर्कटशृंगी'.

**कर्कटाह्व**–पु., वनस्पति० **बिल्वः** (रा. ११.१३४)

एक वनस्पती; बेल.

**कर्कटाह्वया**–स्त्री., वनस्पति० **कर्कटशृङ्गी** (ध. १.८५)

एक वनस्पती, पहा 'कर्कटशृंगी.'

**कर्कटाह्वा**-स्त्री., वनस्पति० कर्कटशृंगी ( रा. ६.१११ )

**कर्कटी**-स्त्री., वनस्पति० गुणाः-मधुरा शीता, लघुर्मूत्रला रुच्या कफपित्तघ्नी मूत्ररोधमूत्रकृच्छ्राऽश्मरीवान्तिश्रमदाहादिरोगघ्नी च
( रा. ७.२५१-२५४ )

हिं.—काकडी.
म.—काकडी.
बं.—खिरा.
गु.—काकरी.
त.—मुल्लवेल्लरी.

एक फळ. काकडी; **गुण**-गोड, थंड, हलकी, मूत्रल रुचकर, कफपित्तनाशक, मूत्राचा अवरोध, लघ्वी कष्टाने होणे, मूतखडा, वांती, थकवा, दाह, हे विकार नाहीसे करते.

**एर्वारुकम्** ( रा. ७.२६२ ) काकडीचा एक प्रकार.
**चिर्भटः** ( रा. ७.२६२ ) चिभडे.
**देवदाली** ( रा. ३.२४३ ) देवडांगरी.
**घोण्टा** ( रा. ८.२२ ) बोर.

**कर्कन्धु-धू**-स्त्री., वनस्पति० बदरभेदः, क्षुद्रबदरम् ( चसू.४.१३ ) शृगालबदरी ( चसू. २७.१३२ )
**विरेचनोपगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१३ )
**फलमस्या आसवार्थमुपयुज्यते** ( चसू. २५.४९ )
**पित्तश्लेष्मप्रकोपणी** ( चसू. २७.१३२ )
**आमकर्कन्धुगुणाः-पित्तकफावहा, पक्वाया गुणाः-मधुरा स्निग्धा सरा पित्तानिलहरा च**
( सुसू. ४६.१४५ )

हिं—छोटे बेर.
म—**लघुबोर.**
बं.—सेया कुल.

एक वनस्पति. लहान बोर. कोल्ह्याचे बोर. **कच्चे**-पित्तकफवर्धक. **पक्के**-गोड, स्निग्ध, सारक, वातपित्त नाशक. आसवासाठी फळ उपयोगी.

**मान० अष्टमाषकम्** ( चचि. २६.१९३ )
एक वजन, आठ मासे.

**कर्कन्धुक**-न., वनस्पति० **कर्कन्धुः** ( ध. ५.९६ )
एक वनस्पती. बोर. पहा 'कर्कन्धु.'

**कर्कन्धू**-स्त्री., वनस्पति० **कर्कन्धुः**
( चसू. २७-१३२ रा. ११.१४६ )
एक वनस्पती. बोर. पहा 'कर्कन्धु'.

**कर्कश**-वि., **खरस्पर्शयुक्तम्, कठोरम्** ( चचि. ७.१७ )
**गुण-खरः खरस्पर्शः** ( सुसू. ४६.२९७ )
**आर्द्रीभावविनाशकरः** ( सुसू. ४६.५१६ )

**( कर्कशा )**-स्त्री., वनस्पति० वृश्चिकाली ( रापरि. ९.८ )
एक वनस्पती. विंचवी.

**-च्छद**-पु., वनस्पति० पटोलः ( ध. १.४९ )
पडवळ.

**-दला**-स्त्री., वनस्पति० दग्धा ( रा. ९.२८ )
एक वनस्पती.

**कर्कारु**-पु., वनस्पति० षड्भुजा, त्रपुसभेदः खर्बुजः ( अहृसू. ६.८७ ) द्र० 'त्रपुस'
एक वनस्पती. खर्बुज. पहा 'त्रपुस'.

**-तैल**-न., **कर्कारुबीजभवं तैलम्, इदं मधुरं मधुरविपाकं सृष्टमूत्रं वातपित्तप्रशमनं अग्निमान्द्यकरञ्च**
( सुसू. ४५.१२० )
खर्बुजाच्या बियांचे तेल. हे गोड, पचनानंतरही गोड, लघ्वी अधिक करणारे, वातपित्तनाशक आणि अग्नि मंद करणारे.

**कर्कारुक**-न., वनस्पति० त्रपुसभेदः वाडवं त्रपुसम्
( सुचि. ३१.५ )

**द्र० त्रपुस.**
एक वनस्पती, फार लहान.

**कूष्माण्डभेदः, प्रवाहिकायामेतत् दधिदाडिमसिद्धेन बहुस्नेहेन च भोजयेत्।** (चचि. १९.३२) **उपनाहे वातार्बुदे उपयुज्यते** ( सुचि. १८.२९-३० )
कोहळ्याचा एक प्रकार. आव असताना दहीं आणि डाळिंब यांनी सिद्ध करून पुष्कळ स्नेह घालून अन्नाबरोबर भरपूर वापरावे. वातार्बुदावरही पोटिस म्हणून चांगले.

**कर्किन्**-पु., वनस्पति० कर्कटशृङ्गी ( असंउ. ४९ )
एक वनस्पती. काकडशिंगी.

**कर्केतन**-पु., रत्न० **पद्मरागः, अयं विषापहः**
( चचि. २३.२५२ )
**माणिक्यम्** ( असंउ. ४२. इन्दुः )
एक रत्न. माणिक, लाल. हा विषनाशक आहे.

**कर्कोट**-न., वनस्पति० **कर्कोटकीभेदः-तिक्ता कर्कटी** ( हे. अहृसू. ६.७६ ) द्र० '**कर्कोटकी.**'
एक वनस्पती. कटोंले. प्रकार. कडु कटोंले.
**सर्पविशेषः** ( र. १०.७६ )
एक प्रकारचा सर्प.

**कर्कोटक**-पु., शाक० **तिक्ता कर्कटी कफपित्तहर तिक्तः शीतः कटुपाकी च** ( चसू. २७.९६ )
एक भाजी, कडु काकडी. **गुण**-कफपित्तनाशक. कडु, थंड, पचल्यावर कडु.

खरखरीत स्पर्शाचा, ओलावा नाशक, आर्द्रतानाशक कठीण.

**वनस्पति० कासमर्दः** ( ध. ४.११८ )
एक वनस्पती. कासविंदा.

पु., न., **कम्पिल्लकः** ( अहसू. ६.७८ )
कपिला एक वनस्पती.

**वनस्पति० इक्षुः** ( ध. ४.१२० ) ऊस.

न., **वनस्पति० वन्ध्याकर्कोटकी** ( र. २.१५० )
वांझकर्टोली. एक वनस्पती.

**कर्कोटकी**–स्त्री., **वनस्पति० कोशातकी** ( र. ७.२८८ )
**राजकोशातकी** ( चक. ४.३ )
**महाकोशातकी** ( ध. १.१८९ )
**गुणाः–कटुतिक्ता दीपनी रुच्या, त्रिदोषघ्नी विष-शिरोरोगनाशिनी** ( ध. १.१८७ )
म.—कर्टोली.
गु.—कंटोलना, कर्तोला, कंकोला.
बं.—कंकोल.
वनस्पती. कडु दोडके, कडु घोसाळे, कडु कर्टोले. **गुण**–तिखट, कडू, दीपक, रुचि उत्पन्न करणारी, त्रिदोषनाशक, विष व शिरोरोगनाशक.

**रेवतीग्रह०; सा दारुणा जातहारिणी**
( क. रेवती क. ५४ )
बालग्रहांपैकी एक. जन्मतःच मारणारी.

**कर्कोटिका**–स्त्री., **वनस्पति० कूष्माण्डम्** ( रा. ७.२६९ )
एक वनस्पती. कोहळा.

**कर्कोटी**–स्त्री., **वनस्पति०** वन्ध्यालता **वन्ध्याकर्कोटकी**
( र. ११.४८ )
एक वनस्पती. वांझकर्टोली.

**कर्चूर**–पु., न., **वनस्पति० गुणाः–कटुस्तिक्त उष्णो रोचनो दीपनो मुखवैशद्यकृत् हृद्यो वातकफघ्नः प्लीहरोगगुल्मार्शोगलगण्डकासघ्नः** ( ध. ३.९४ )
**श्वासहिक्काहितः सुगन्धिश्च** ( चसू. २७.१५५ )
हिं.—कचूर.
म.—कचोरा, नरकचोरा, काचरी.
गु.—कचूरी.
बं.—एकांगी.
त.—कस्तूरी मंजल, निर्विशम्.
फा.—जरंबार, जद्वार खाटा.
कचोरा, नरकचोरा, काचरी, कपूरकाचरी. **गुण**–तिखट, कडु, उष्ण, अग्निदीपक, तोंड स्वच्छ करणारी, हृदयाला हितकर, सुगंधि, रुचिकर, वातकफनाशक, प्लीहावृद्धी, गुल्म, मूळव्याध, गलगंड व खोकलानाशक.

**कर्ण**–पु., **शारीर०, ऊर्ध्वजत्रुगतः** ( चशा. ७.७ )
**श्रोत्रेन्द्रियं यस्याऽधिष्ठानम्** ( सुसू. ३५.१२ )
**श्रोत्रेन्द्रियस्याधिष्ठानम्** ( चसू. ८.१० )
**प्रमाणतश्चतुरङ्गुलः** ( चवि. ८.११७ )
**रक्षाभूषणनिमित्तं बालानां कर्णौ विध्येते ।**
( सुसू. १६.३ )
शरीराचा एक अवयव. इंद्रिय. श्रोत्रेंद्रियाचे अधिष्ठान. कान. स्वतःच्या चार अंगुळाइतके प्रमाण असावे. मुलांना दागिने घालण्याकरिता व त्याचे रक्षण व्हावे म्हणून कान टोचतात.

**ज्ञानेंद्रिय० श्रोत्रेन्द्रियम्** ( सुसू. ३५.१२ )
एक ज्ञानेंद्रिय. शब्दाचे ज्ञान देणारे. ऐकणारे.

**–कण्डू**–स्त्री., **कर्णरोग०, लक्षणम्–कर्णे संचितेन श्लेष्मणा कण्डूर्भवति ।** ( सुउ. २०.११ )
**चिकित्सा–क्रमेण सस्वेदवमनं वैरेचनिको धूमो मूर्धविरेचनम्, कफहारकः सर्वश्च विधिः**
( सुउ. २१.५६ )
कानात खाज. कानाचा एक रोग. कानात साठलेल्या मळाने–कफाने खाज होते. **उपाय**–घाम, वांती, रेचक, धूम्रपान, डोक्याचे रेचक नस्य, सर्व कफनाशक विधी.

**–क्ष्वेड**–पु., **कर्णरोग० अनेकविधहुंकारादिश्रवणम्**
( सुउ. ४०.१७३ )
**लक्षणम्–श्रमात् क्षयाद्रूक्षकषायभोजनात् प्रकुपितः पित्तादि–संसृष्टो वायुः शब्दपथे प्रतिष्ठितः सन् विरिक्तशीर्षस्य कर्णक्ष्वेडं करोति । कर्णनादस्तु केवलवातारब्धो वंशघोषानुकारिशब्दान्वितो भवति इति द्वयोः भेदः ।** ( सुउ. २०.९ )
कानात आवाज. कानाचा एक रोग. अनेक प्रकारचे हूंऽ हूंऽ असे आवाज ऐकू येतात. श्रम, रुक्ष, तुरट अन्न भक्षण आणि धातुक्षय यांनी वायु इतर दोषांसह शिरोविरेचनाने ज्याच्या डोक्यातील दोष निघून गेले अशा व्यक्तीच्या कानात असा आवाज उत्पन्न करतो. कर्णनाद हा विकार केवळ वाताने होतो. वेळूमधून आवाज होतो तसा.

**–क्ष्वेडन**–न., **कर्णक्ष्वेडः** ( असंशा. ६.४० )
पहा 'कर्णक्ष्वेड.'

**–क्ष्वेडिन्**–वि., **कर्णनादवान्** ( चचि. १६.१३ )
रोगी–कानात आवाज होणारा.

**–गतरोगप्रतिषेध**–पु., **गतरोगप्रतिषेध अध्याय०** ( सुउ. २१.१ )
कानातील रोगाचा प्रतिकार सांगितलेला अध्याय.

**–गतरोगविज्ञानीय–गतरोगविज्ञानीय**–वि., **अध्याय० कर्णगते रोगे विज्ञानम् अधिकृत्य कृतः** ( सुउ. २०.१ )
कानातील रोगांचे ज्ञान वर्णिलेला अध्याय.

**–गूथक**–पु., **कर्णरोग०, कर्णमलः, संचितः कफो यदा पित्ततेजसा शुष्को भवति तदा कर्णे मलसंचय-रूपः कर्णगूथकः जायते** ( सुउ. २०.११ )
कानाचा एक रोग; कानात मळ संचित होऊन पित्ताने सुकतो व साठतो तो रोग.

**–छिद्र**–न., **कर्णमध्यः, कर्णविवरम्** ( सुउ. २१.५८ ) कानाचे भोक, पोकळी.

**–तर्पण**–न., **उपक्रम० तैलादिना कर्णपूरणम्** ( चसू. ५.८४ )
**तत् कर्णयोस्तृप्तिकरं बलकरं वा बाधिर्यादिविनाशक-त्वेन** ( चसू. १३.२५ )
उपचार–तेल इत्यादींनी कान भरणे. हे बहिरेपणा घालवून कानाला समाधान देणारे व बल वाढविणारे.

**–तैल**–न., **श्रुतिमान्द्यनाशकरं तैलम्** (चसू. १३.२५)
बहिरेपणा नाहीसे करणारे तेल.

**–धार**–पु., **नाविकः** ( सुसू. ३४.१८ ) नावाडी.

**–नाडी**–स्त्री., **कर्णरोग०** ( असंसू. ३४.८ )
एक कर्णरोग.

**–नाद**–पु., **कर्णरोग०** ( असंउ. २१ )
**वाते कर्णस्रोतःस्थिते भेरीमृदङ्गशङ्खवंशादीनां विवि-धान् स्वरान् शृणोति** ( मा. कर्ण )
कानाची स्रोतसे वाताने दुष्ट झाली की भेरी, मृदंग, शंख, पावा इत्यादींच्या आवाजासारखे आवाज कानात ऐकू येतात.

**–पाक**–पु., **कर्णरोग. कर्णे कर्णयोर्वा पित्तप्रकोपात् पाको भवति तेन पीडाकराणि विकोथविक्लेदादीनि भवन्ति ।** ( सुउ. २०.१५ )
एक कर्णरोग. कानात पित्तदुष्टीमुळे तेथील दोष धातु मळ यांचे पचन होते व पाणी पू होतो. कूजही होते. कानात ठणकाही होतो.

**–पाली**–स्त्री., **शारीर०, बाह्यकर्णस्याऽधोभागः** ( अहसू. २९.४९ )
बाहेरच्या कानाचा खालचा भाग. पाळी.

**–पीठ**–न., **प्रत्यङ्ग० पुत्रिकोपरिप्रदेशः** ( ड. सुसू. १६.११ )
**कर्णाधोभागः** ( असंउ. १ )
कान या अवयवाचा उप अवयव. कानाच्या पाळीचा वरचा भाग. कानाचा खालचा भाग.

**–पुत्रक**–पु., न., **प्रत्यङ्ग० कर्णपाल्या अधोभागः** ( चचा. ८.५१ )
**बाह्यकर्णः, षट्पञ्चाशत्प्रत्यङ्गेष्वेकम्** ( चशा. ७.११ )
कानाचा एक उप अवयव. कानाच्या पाळीचा खालचा भाग. बाह्य कान. छप्पन्न उपांगांपैकी एक.

**–पूरक**–पु., **वनस्पति० अशोकः** ( ध. ५.१५९ )
एक वनस्पती. अशोक.
**कदम्बः** ( ध. ५.१०४ )
कळंब.

**–पूरण**–न., **उपक्रम० तैलेन कर्णस्य पूरणम्** ( सुचि. २४.२९ )
**ऊर्ध्वकायगते भग्ने कर्णपूरणं शस्तम्** ( सुचि. ३.५४ )
**कर्णपूरणविधिः–कर्णे तैलादिपूरणं कृत्वा कर्णमूलं विमर्दयन्तैलादि यावन्मात्राशतं धारयेत्तेन रुजो मार्दवं स्यात्** ( असंसू. ३१ )
एक उपचार. कानात तेल घालणे. मान व डोके यांतील हाड मोडले किंवा निखळले तर कानात तेल घालणे उपयुक्त. **विधी**–कानात तेल इत्यादी गरम करून घालावे व कानाच्या मुळाशी मर्दन करावे. तेल शंभर मात्रा इतका काळ ठेवावे. याने वेदना, ठणका कमी होतो. डोळ्याची एक उघडझाप होण्याचा काळ म्हणजे एक मात्रा.

**–प्रतिनाह**–पु., **कर्णरोग० संप्राप्तिलक्षणे–कर्णविट्क-स्नेहस्वेदाभ्यां विलयनं प्राप्तो घ्राणमुखं प्रपद्यते तदा कफमारुताभ्यां सन्निपातेन वा जायमानः कर्णप्रति-नाहो भवति स चासौ सकलशिरोरोगकारी** ( सुउ. २०.१२ )
कानाचा एक रोग. कानाचा मळ, तेल व शेक यांच्या उपयोगामुळे ओला व खरबरीत होऊन जेव्हा नाकाच्या छिद्रापाशी येऊन संचित होतो व त्यामुळे कफ, वात किंवा तिन्ही दोष प्रकुपित होऊन नाक चोंदले जाते तेव्हा हा विकार होतो. व पुढे सर्व शिरोरोग निर्माण होतात.

**–प्रपाक**–पु., **कर्णरोग० कर्णपाकः** ( सुउ. २०.१५ )
**द्र० 'कर्णपाक'**
कानाचा एक विकार. कान पिकणे. पहा 'कर्णपाक.'

**–बन्धाकृति**–स्त्री., बन्धाकृति० कर्णवेधनानन्तरं तद्बन्धनाकृतिः, सा च पञ्चदशविधा तद् यथा नेमिसन्धानकः उत्पलभेद्यकः, वल्लूरकः आसङ्गिमः, गण्डकर्णः, आहार्यः, निर्वेधिमः, व्यायोजिमः कपाटसंधिकः, अर्धकपाटसंधिकः, संक्षिप्तः, हीनकर्णः, वल्लीकर्णः, यष्टिकर्णः, काकौष्ठकश्च ।
(सुसू. १६.१०)

कानाला बांधण्याच्या पट्ट्यांचे आकार. कान टोचल्यानंतर कसा बांधावा त्याचा आकार. ते पंधरा आहेत. ती नांवे वर आहेत.

**–भग्न**–न., रोग० कर्णस्य भग्नम्, भग्नः कर्णः कुटिलोऽन्तःप्रविष्टो वा स्यात् । भग्नं कर्णसमं घृतप्लुतं च कृत्वा बध्नीयात् । सद्यःक्षतविधानेन चोपाचरेत् । मधुघृताभ्यङ्गशीतपरिषेकादि ।
(सुचि. ३.४५)

कानाच्या हाडांचा भंग, मोडणे. मोडलेला कान वेडावाकडा होतो किंवा आत दाबला जातो. मोडलेला भाग योग्य दिशेने ओढून पूर्वीसारखा करून तुपाने माखून बांधावा. आघाताने झालेल्या ताज्या व्रणावरील उपचाराप्रमाणे मध तूप चोपडणे. थंड पाण्याचा शिपका मारणे, इत्यादी उपचार करावेत.

**–मूल**–न., प्रत्यङ्ग० कर्णपर्यन्तः तदङ्गुलप्रमाणम्
(सुसू. ३५.१२)

कानाचे मूळ, डोक्याशी चिकटलेली कानाची बैठक ( कानशील ) बैठकीचा घेर; कान या अवयवाचे उपांग. एक अंगुळ. कानशील.

**–मोटी**–स्त्री. वनस्पती० कर्णस्फोटा
(र. १६.९९–१०२)

**कानफुटी, कानफोडी. तिळवण**–एक वनस्पती.

**–रुजू**–स्त्री., रोग० कर्णशूलः (चसू. १३.१६)
कानातील शूल. ठणका.

**–रोग**–पु., कर्णगतरोगाः, चरकमतेन चत्वारः कर्णरोगाः वातजपित्तजकफजसंनिपातजभेदात्, तत्र वातजलक्षणं नादः कर्णमलस्य शोषोऽतिरुक् तनुः स्रावोऽश्रवणं च । पित्तजे सरागः शोफो दरणं विदाहः कर्णश्च सपीतपूतिः । कफजे वैश्रुत्यं कर्णस्य कण्डूः स्थिरशोफः शुक्लस्निग्धवर्णत्वमल्पा च रुक् भवति । संनिपातजे ह्येतानि सर्वाणि लक्षणानि संभवन्ति तत्र यस्य दोषस्य प्राबल्यं भवति स्रावोऽपि तस्य वर्णसादृश्यमधिगच्छति ।
(चचि. २६.१२७–१२८)



सुश्रुतमतेन तु अष्टाविंशतिः कर्णरोगाः ते च कर्णशूलं, प्रणादो, बाधिर्यं, क्ष्वेडः, कर्णस्रावः, कर्णकण्डूः, कर्णवर्चः, कृमिकर्णः, प्रतिनाहो, द्वौ विद्रधी, कर्णपाकः पूतिकर्णश्चतुर्विधार्शः, सप्तविधं कर्णार्बुदं, चतुर्विधः कर्णशोफश्च । (सुउ. २०.३–५)

कानाचे रोग. चरकमत–चार प्रकार. **वातज**–मळ सुकणे, फार ठणका, आवाज, पातळ स्राव, कमी ऐकू येणे. **पित्तज**–लालीयुक्त सूज, फाटल्यासारखी पीडा, दाह, कानात पिवळट दुर्गंधयुक्त मळ. **कफज**–नीट ऐकू न येणे, पांढरट व स्निग्ध रंग, थोडे दुःख जाड व लवकर कमी न होणारी सूज, खाज.

**संनिपातज**–ही सर्व लक्षणे होतात; तरी पण ज्या दोषाचे आधिक्य असेल ती लक्षणे प्रामुख्याने असतात. सुश्रुताने अठ्ठावीस विकार दिले आहेत ते वर आहेत.

**–विदारिका**–स्त्री., कर्णरोग० अयं संनिपाताज्जायते, लक्षणम् कर्णसमवर्णः सवेदनः स्तब्धः श्वयथुः । उपेक्षितश्चेत् पक्वः सन् कटुतैलनिभं स्रावं स्रवति, कृच्छ्राच्च रोहति. रूढा च कर्णशष्कुलीं संकोचयति ।
(अहउ. १७.१७–१८)

कानाचा एक रोग. हा तिन्ही दोषांच्या कोपाने होतो. यात सूज घट्ट व कानाच्या रंगाची असते. पिकला तर मोहरीच्या तेलासारखा स्राव. व्रण कष्टाने रुझतो व रुझल्यानंतर कानाच्या पाळ्या आकसतात.

**–विद्रधि**–पु., कर्णरोग० संप्राप्तिः–कर्णकण्डूयनाद् व्रणे जाते सति विद्रधिलक्षणस्तीव्ररूपोऽयं स्यात् ।
(असंउ. २१)

कानाचा एक रोग. कान खाजविल्याने झालेल्या व्रणाचा विद्रधी होतो, तीव्र स्वरूपाचा हा असतो.

**–वेदना**–स्त्री., कर्णरोग० लक्षणम्–हस्ताभ्यां कर्णस्पर्शः भृशं शिरोभ्रमः अरतिः, अस्वप्नः अरोचकश्च ।
(कासू. २५.७)

कानाचा ठणका. एक कानरोग, सारखे कानाला हात लावणे, सारखे डोके हालवणे, बेचैनी, झोप नसणे, रुची नसणे.

**–वेध**–पु., संस्कार० कर्णव्यधः (असंउ. १)
एक संस्कार. कान टोचणे.

**–वेधनी**–स्त्री., शस्त्र० कर्णव्यधार्थं सूचिः इयं त्रिभागसुषिरा त्र्यङ्गुला च (अहसू. २६.२६)

एक शस्त्र. कान टोचण्याची सुई. तीन अंगुळे लांब असून तिचा एक तृतीयांश भाग पोकळ असावा.

**–व्यध**–पु., **संस्कार० रक्षाभूषणनिमित्तं बालस्य कर्णौ विध्येते । तौ षष्ठे मासि सप्तमे वा शुक्लपक्षे प्रशस्तेषु तिथिकरणनक्षत्रमुहूर्तेषु कृतमङ्गलस्वस्तिवाचनं धात्र्यङ्के कुमारधराङ्के वा कुमारमुपवेश्य बालक्रीडनकैः प्रलोभ्याभिसान्त्वयन् भिषग्वामहस्तेनाकृष्य कर्णं दैवकृते छिद्रे आदित्यकरावभासिते शनैःशनैर्दक्षिणहस्तेन ऋजु विध्येत् । प्रतनुकं सूच्या बहलमारया; पूर्वं दक्षिणं कुमारस्य; वामं कुमार्याः ततः पिचुवर्तिं प्रवेशयेत् ।** ( सुसू. १६.१–३ )
कान टोचणे. एक संस्कार. बालकाचे रक्षण व्हावे म्हणून व अलंकारही घालता यावा म्हणून कान टोचावयाचे असतात. सहाव्या किंवा सातव्या महिन्यात शुभ मुहूर्तावर योग्य विधीने आईच्या किंवा बालकाला सांभाळणाऱ्याच्या मांडीवर बसवून कानाची पाळी दैवकृत म्हणजे देवाने जन्मतःच केलेले छिद्र उन्हात पाहून तेथेच उजव्या हाताने सरळ सुई सावकाश टोचावी, पातळ पाळीला सुईने, व जाड पाळीला आरीने टोचावे. कुमाराचा प्रथम उजवा व कुमारीचा प्रथम डावा कान टोचावा नंतर दोरा ओवावा व बांधावा.

**–व्यधन**–न., **शस्त्र० एतत् त्र्यङ्गुलायतमङ्गुलसुषिरं घनं वा यूथिकामुकुलाग्रं भवति ।** ( असंसू. ३४ )
एक शस्त्र. हे पोकळ किंवा घन तसेच जुईच्या कळीच्या टोकासारखे टोक असलेले असते. पहा ' कर्णवेधनी '

**–व्यधबन्धविधि** अध्याय० ( सुसू. १६.१ )
कान टोचणे व बांधणे या संबंधी माहिती असलेला अध्याय.

**–शष्कुलिका**–स्त्री., **प्रत्यंग० कर्णगतावर्तकः षट्पञ्चाशत् प्रत्यङ्गेष्वेकम्, द्वे कर्णशष्कुलिके** ( चशा. ७.११ )
कानाचे एक उपांग. कानाचे छिद्र. कानांच्या दोन पाळ्या. छप्पन्न उपांगांपैकी एक.

**–शूल**–पु., न,, **कर्णरोग० कर्णस्य शूलम् अशीतिवातविकारेष्वेकः** ( चसू. २०.११ ) **भेदनवत् पीडाप्रधानलक्षणः कर्णरोगः । स्वरूपम् "हनुशङ्खशिरोग्रीवं भिन्दन्निव वायु कर्णयोः शूलं कुरुते"** ( सुनि. १.८४ ) **संप्राप्तिः–विमार्गगः समीरणः कफादिदोषैर्यथा–दोषमावृतः सन् कर्णयोः समन्ततः शूलमतीव करोति । अयं दुरुपचरो मतः ।** ( सुउ. २०.६ ) **चिकित्सा–आर्द्रक–मातुलुङ्ग–दाडिम–तिन्तिडीकप्रभृतीनां स्वरसैः अजामूत्र–शुक्त–सुरा–लवणैः सिद्धं तैलं कर्णशूले उपयुज्यते ।** ( सुचि. ५,२४ ) **अयं स्वेद्यः** ( चसू. १४.२० )
कानाचा ठणका. कानाचा एक रोग. एक वातरोग.
लक्षण—
फोडल्यासारखी वेदना हेच प्रमुख लक्षण. वायु हनुवटी, कानशील, डोके, मान ही फोडल्याप्रमाणे शूळ करतो. संप्राप्ति–कफादिकांनी अडवलेला वात कानाच्या भोवती अतिशय जोराचा शूळ करतो. हा चिकित्सेला कठीण. चिकित्सा–कान शेकावा. आले, महाळुंग, डाळींब, चिंच इत्यादींचा अंगरस, शेळीचे मूत्र, शिरका, दारु, ताक, सैंधव यांनी सिद्ध तेल गरम करून घालावे. स्वेदनास योग्य विकार.

**–शोथ**–पु., **कर्णरोग० द्र० 'कर्णशोफ'**
कानाची सूज, एक कानरोग. पहा ' कर्णशोफ. '

**–शोधन**–न., **शलाकायन्त्र० एतदश्वत्थपत्रप्रान्तंस्त्रुवाननं च वर्तते ।** ( अहसू. २५.३५ )
एक सळई. यंत्र. हे पळीसारखे तोंड व पिंपळाच्या पानाच्या कडेसारखी बारीक कड असलेले असते.

**–शोफ**–पु., **कर्णरोग० कर्णशोथः**, ( सुउ. २०.१६ ) **कर्णस्य शोफप्रधानो रोगः, वातपित्तकफरक्तजत्वेन सन्निपातेन वा चतुर्विधः कर्णशोफः** ( सुउ. २०.५ )
कानाचा एक रोग. कानाची सूज मुख्य असलेला रोग. वातपित्त कफ व सर्वांचा असा चार प्रकारचा.

**–स्फोटा**–स्त्री., **वनस्पति० गुणाः–कटुस्तिक्ता हिमा सर्वविषग्रहभूतादिदोषसर्वव्याधिविनाशिनी** ( रा. परि.. ३.४१–४२ )

हिं—१ ) जंगली हुरहुर.
२ ) हुरहुर
३ ) कानफटा

म.—१ ) **पिवळा तिळवण**
२ ) **कानफुटी**
३ ) **मोठी तिळवण, हुरहुरु**

गुण—कडू, तिखट, थंड, सर्वविष, ग्रहबाधा, भूतबाधा, सर्व रोगनाशक. एक वनस्पति.

**–संस्राव**–पु., **कर्णरोग० कर्णस्रावः**, ( सुउ. २०.१० ) **द्र० "कर्णस्राव"**

एक कर्णरोग. कर्णस्राव. पहा 'कर्णस्राव.'

-**स्राव**-पु., कर्णरोग० (असंसू. ३७.२५)

**कर्णस्रावः, शिरोभिघातात् जलमज्जनात्कर्णविद्रधेश्च प्रपाकाद्वाप्यथावृतः कर्णः पूयमभिसंस्रावयेत् स कर्णसंस्रावः** (सुउ. २०.३-१०)

कानाचा एक रोग. कान वाहाणे. पाण्यात पोहणे, डोक्यावरच्या आघाताने व कानाचे गळू फुटल्याने वात वाढून कानातून पू वाहातो.

**कर्णक**-पु., **संनिपातज्वरभेदः, प्रलापश्रुतिहासकण्ठग्रहाङ्ग-व्यथाश्वासकासप्रसेकादिलक्षणानि तथैव ज्वरः, कर्णान्तयोः कपोलानां च पीडा, अस्य कालमर्यादा मासत्रयम्, कष्टसाध्यः, केषाञ्चिन्मतेन स्वयं साध्यः** (मा. ज्वर १६) द्र० '**ज्वर**'

संनिपातज्वराचा प्रकार. लक्षणे--ज्वर, बडबड, अंग दुखणे, श्वास, खोकला, गळा धरणे, तोंडाला पाणी सुटणे, ऐकू न येणे, कानाच्या पाळ्या आणि गाल यात वेदना इत्यादी ३ महिने असतो. कष्टाने साध्य. काहीच्या मते साध्य.

पु., **शाक० तिक्तः स्वादुः कषायः कटुपाकी ग्राही वातकृत् पित्तजित्** (असंसू. ७)

एक भाजी. कडू, गोड, तुरट, पचल्यानंतर तिखट, मळ घट्ट व वात करणारी, पित्तघ्न.

**कर्णाटी**-स्त्री., **वनस्पति० हंसपादी** (रा. ५.१६६)

एक वनस्पती. हंसपदी,

**कर्णाभरणक**-पु., **वनस्पति० आरग्वधः** (रा. ९.३३४)

एक वनस्पती. बाहवा.

**कर्णारि**-पु., **वनस्पति० अर्जुनः**, (रा. ९.१९२)

एक वनस्पती. अर्जुनसादडा.

**कर्णार्बुद**-न., **कर्णरोग० तस्य लक्षणं-कर्णस्य रुक्, पूतित्वं बधिरत्वं च** (असंउ. २१.) (र. २४.१)

कानाचा एक रोग. कानात गाठीसारखा वाढ असलेला रोग, ठणका, घाण, बहिरेपणा.

**कर्णार्शस्**-न., **कर्णरोग० तल्लक्षणं-'रुक्पूतिकर्णत्वं बधिरत्वं च**। (असंउ. २१) (र. २४.१)

कानात अंकुर होणे. मूळव्याध एक कानाचा रोग. 'पहा कर्णार्बुद'. लक्षणे तीच. पीडा घाण येणे, बहिरेपणा.

**कर्णावटु**-पु., **प्रत्यंग० कर्णस्य गर्तः** (सुसू. ३५.१२)

कानाचे एक उपांग. कानाचे छिद्र, भोक, पोकळी, खाच.

**कर्णावभञ्जनमुख**-न., **स्वस्तिकयन्त्र० तित्तिरमुखसदृश-यन्त्र० एतत् मसूराऽऽकृत्या कीलेनावबद्धं तथा मूलेऽङ्कुशवदावृत्तवारङ्गं वर्तते। तदस्थिविदष्ट-शल्योद्धरणार्थमुपदिष्टम्**। (सुसू. ७.१०)

स्वस्तिकयंत्रांपैकी एक. तित्तिरपक्ष्याच्या तोंडासारखे तोंड असलेले, अंकुशाच्या आकाराची वाटोळी मूठ असलेले यंत्र.

**कर्णि**-स्त्री., **वनस्पति० गणेरुका**. (ध. परि. ५.२)

एक वनस्पती, नरवेल.

**कर्णिका**-स्त्री., **कर्णिका कमलमध्यकोशः** (सुक. ७.८-९)

**लक्षण० तत्समानाकारो ग्रन्थिः कर्णिका**

कमळाचा मध्यभाग. कोश. त्या आकाराची गाठ एक रोग.

**लक्षण० कर्णिकाकारो ग्रन्थिः** (चचि. २३.१७८)

एक लक्षण० कर्णिकेच्या आकाराची गाठ.

**वर्तुलाकृतिरुत्सेधः** (चसि. ३.१०)

वर्तुळाकृति उचललेला भाग.

**छत्राकारा मांसकन्दी** (सुचि. ३५.७)
(सुक. ८.१३६-१३७)

'**पद्मकर्णिकाकारत्वात्कर्णिका भण्यते**' ड.

छत्रीच्या आकाराचे मांसांकुर. कमळाच्या कर्णि-केच्या आकाराचे म्हणून कर्णिका.

**वनस्पति० अग्निमन्थः** (ध. १.११२)

एक वनस्पती. अरणी; पांढरी टाकळी.

**वनस्पति० काकोली** (ध. १.१३२)

अष्टवर्गांपैकी एक. कावळी, क्षोलिका. वायसाली.

**उपकरण० इदं गजहस्ताग्राकारं शाकच्छेदनायोप-युज्यते** (र. ७.२१)

एक उपकरण. भाजी चिरण्याची सुरी, चाकू, विळी.

**कर्णिकार**-पु., **वनस्पति० आरग्वधभेद० "कर्णिकारो रसे तिक्तः कटूष्णः कफशूलहृत्। उदरक्रिमिमेदघ्नो व्रणगुल्मनिवारणः॥"** (रा. ९.३३७)

एक वनस्पती. एक प्रकारचा बहावा. गुण--कडू, तिखट, उष्ण, कफशूलनाशक, मेद कमी करणारा, व्रण, गुल्म, उदर व क्रमिनाशक.

**वनस्पति० कृतमालः 'कृतमालो मधुः शीतः पित्तघ्नो मधुरः सरः। तत्फलं मधुरं बल्यं वात-पित्ताऽऽमजित्सरम्॥'** (ध. १.२२२)

बहावा प्रकार. गुण--गोड पचल्यानंतरही गोड, थंड, पित्तनाशक, सारक. त्याचे फळ गोड, सारक, आम, वात, पित्त जिंकणारे व बलवर्धक.

कण्टकिवृक्षः किंचिद्रक्तपुष्पः ( र. १०.९२ )
पांगारा.
**गणेरुका** ( ध. परि. ५.२ ) नरवेल.
**लोहितपुष्पवृक्षः**, ( असंशा. पा. सा. ८.१४ )
तांबड्या फुलांचा एक वृक्ष.

**कर्णिन्**–पु., वनस्पति० आरग्वधः ( ध. १.२१९ )
बहावा एक वनस्पती.

**कर्णिनी**–योनिव्यापद्० अप्राप्ते गर्भनिष्क्रमणकाले प्रवाहणं कुर्वन्त्यः गर्भेण पिहितोऽनिलः श्लेष्मरक्तेण मूर्च्छितः सन् योनौ कर्णिकां–पद्मबीजकोशाकारं मांसग्रन्थिं जनयेत् । ( चचि. ३०.२७–२८. ३८. )
एक योनिरोग. प्रसूतीच्या वेळी वेणा नसतांना उगीचच कुंथल्याने गर्भाकडून वात प्रकुपित होऊन कफ रक्त प्रकुपित करून योनीमध्ये कमळाच्या बीच्या कोशाच्या आकाराची मांसाची गाठ करतो ती.

**कर्णी**–स्त्री., वनस्पति०=द्रवन्ती, ( रा. ५.३४७ )
उंदीरकानी.

**कर्तरी**–स्त्री., शस्त्र० इयं दशाङ्गुला शरारिमुखी, ( सुसू. ८.७ ड. ) 'कर्तरी त्रिभागपाशा व्रणस्नायुकेशसूत्रच्छेदनार्थम् ।' ( असंसू. ३४.२७ )
एक शस्त्र. दहा अंगुळे लांब शरारिपक्षाच्या मुखासारखे तोंड असलेली. कातरी व्रण, स्नायु, केश, दोरा इत्यादी कातरण्याकरिता.

**कर्तरीय**–न., स्थावरविष०, अस्य त्वक्सारो निर्यासश्च विषमयो भवति । ( सुक. २.५ )
एक वनस्पति विष. याची साल, गाभा, डिंक, विषमय असतो.

**कर्तृ**–पु., यः स्वातन्त्र्येण कर्म करोति सः एव 'कारण' संज्ञयाभिधीयते, ( चवि. ८.६९ ) निदानम्,. हेतुः ( चनि. १.३ ) अत्र 'स्वतन्त्रः कर्ता' इति पाणिनीयसूत्रमप्यनुसन्धेयम् ।
कर्ता. जो स्वातंत्र्याने कर्म करितो तो. तोच कारण म्हटला जातो. 'स्वतंत्र, कर्ता' हे पाणिनीच्या सूत्रातही आहे.

**कर्तृण**–( न., वनस्पति०=भूतिकम्, ( असंउ. ४. इन्दु )
एक वनस्पती. रोहिष गवत.

**कर्दम**–( पु., ) पङ्कः, ( सुचि. १७.६ ) चिखल.
**रोग०, विसर्पभेदः, सप्तविसर्पेष्वेकः**, ( चसू. १९. ४(२) द्र० '**कर्दमविसर्प**'
एक रोग, धांवऱ्याच्या सात प्रकारापैकी एक प्रकार पहा 'कर्दम विसर्प'.
शालि., पंकिलभूमिजः, आहारार्थं हितः,
( सुसू. २०.५ )
चिखलाच्या जमिनीत होणारा तांदूळ आहाराकरिता हितकर.
**विष.** तत्कर्दमसदृशं वर्तते, ( र. २९-१६ )
एक विष चिखलासारखे असते.

**–वर्त्म**–न., नेत्ररोग० ( सुउ. ३.६ ) अस्मिन् कृष्णकर्दमोपमं च नेत्रवर्त्म भवति । ( असंउ. ११ )
डोळ्याचा एक रोग. यात डोळ्याची पापणी काळ्या चिखलासारखी दिसते.

**–विसर्प** रोग० लक्षणम्–कफपित्तं प्रकुपितं सदेकदेशे विसर्पति देहिनं प्रक्लेदयति च । तद्विकाराः–शीतज्वरः शिरोगुरुत्वं दाहः स्तैमित्यमङ्गावसदनं निद्रा तन्द्रा मोहोऽन्नद्वेषः प्रलापोऽग्निनाशो दौर्बल्यमस्थिभेदो मूर्च्छा पिपासा स्रोतसां प्रलेपो जाड्यमिन्द्रियाणां प्रायोपवेशनमङ्गविक्षेपोऽङ्गमर्दोऽरतिरौत्सुक्यं चोपजायते । प्रायश्चामाशये विसर्पत्यलसक एकदेशग्राही । यस्मिन्नवकाशे विसर्पो विसर्पति सोवकाशो रक्तपीतपाण्डुपिडकावकीर्ण इव मेचकाभः कालो मलिनः स्निग्धो बहूष्मा गुरुः स्तिमितवेदनः श्वयथुमान् गम्भीरपाको निरास्रावः शीघ्रक्लेदः स्विन्नक्लिन्नपूतिमांसत्वक् क्रमेणाल्परुक् परामृष्टोऽवदीर्यते कर्दम इवावपीडितोऽन्तरं प्रयच्छत्युपक्लिन्नपूतिमांसत्यागी सिरास्नायुसंदर्शी कुणपगन्धी च भवति, संज्ञास्मृतिहन्ता च । तं कर्दमविसर्पपरीतमचिकित्स्यं विद्यात्
( चचि. २१.३८ )
एक रोग व कफ पित्त प्रकुपित होऊन शरीरभर पसरतात व देहात क्लेद उत्पन्न करतात असा हा विकार आहे. यात थंडीताप, डोके जड, दाह, अंगाला ओले वस्त्र गुंडाळल्याप्रमाणे वाटणे, अंग गळणे, झापड, मोह, अन्नद्वेष, बडबड, अग्निमांद्य, दुर्बलता, हाडे, फुटल्याप्रमाणे वाटणे, मूर्च्छा, तहान स्रोतसे लपेटल्याप्रमाणे, इंद्रियांना जडत्व, आंग मोडून येणे, निरुत्साह ही लक्षणे होतात. चिखल्या विसर्प, चिखले धावरे त्वचेवर ज्या ठिकाणी हे धावरे होते तेथे तांबड्या, पांढऱ्या पिवळ्या पुळ्या विखुरलेल्या असतात. काजळासारखा काळा, मळकट, स्निग्ध फार उष्ण, जड, जखडल्यासारख्या वेदना, सूज, खोल पिकणे. स्राव नसलेला

पण चटकन ओला. मांस व त्वचा पिकलेली व ओलसर दुर्गंधयुक्त. क्रमाने वेदना कमी होतात. स्पर्श केला तर फाटतो. चिखलाला दाबला असता जसा खळगा पडतो तसा तो दाबला असता व्रण होतो. ओलसर व सडलेले मांस निघते. त्यामुळे आतल्या शिरा, स्नायू दिसतात. प्रेताची घाण येते. शिवाय अग्निनाश, झोप, गुंगी, मूर्च्छा, बडबड, अंग उडणे, बेचैनी, दुर्बलता इत्यादी अनेक उग्र चिन्हे होतात.

**कर्दमक**–पु., **रोग० विसर्पभेदः द्र० ' कर्दमविसर्प '** ( चचि. २१.१४ )

एक रोग. धावऱ्याचा एक प्रकार. पहा ' कर्दमविसर्प'.

**राजिमान् सर्प०**; ४.३४( ३ )

राजिमान् सर्प.

**शालि० अतिशयपङ्किले स्थाने उत्पद्यते,** ( सुसू. ४६.४ )

तांदूळ. अतिशय चिखल असतो तेथे उत्पन्न होतो तो.

**कन्दविष० तज्जन्यानि लक्षणानि प्रसेको विड्भेदो नेत्रपीतता च.** ( सुक. २.५ )

एक कंदांपैकी विष. **लक्षणे**–तोंडाला पाणी सुटणे. मळ पातळ, डोळे पिवळे.

**कर्दमिन्**–पु., **वनस्पति० मुद्गरः**, ( रा. परि. १०.२१ )

एक वनस्पति. सात पानाचा वाटोळ्या अति सुगंधी फुलांचा वृक्ष.

**कर्पर**–पु., **पात्र० खर्परम्, ज्वालासन्तप्तं कपालम्,** ( अहसू. ६.४२ )

खापर. मातीच्या भांड्याचा तुकडा. अग्निज्वालेत तापलेले खापर.

**कर्पराल**–पु., **वनस्पति० अक्षोटः** ( ध. ५.६० )

एक वनस्पती. आक्रोड.

**कर्परिकातुत्थ**–न., **खनिज० तुत्थम्**, ( ध. ३.१४५ )

खाणीतला. मोरचूद.

**कर्परीतुत्थक**–न., **खनिज० तुत्थम्**, ( ध. ३.१४५ )

खाणीतला. मोरचूद.

**कर्पूर**–पु. न., **सुगन्धिद्रव्य० इदं शुभ्रतरनिर्यासरूपं ज्वालाग्राहि द्रव्यम्, भुक्तेरितकफनाशनार्थमुपयुज्यते** ( सुसू. ४६.४८३–४८५; चचि. २८.१५३; ) **गुणाः कटुस्तिक्तो मधुरः शीतः** ( उष्णः. रा. ) **चक्षुष्यो मदकरस्तृष्णामेदोविषापहः** ( ध., ३.३१) **कफापहं वक्त्रक्लेददौर्गन्ध्यनाशनं च, मुखशोषे वैरस्ये चापि युक्तम्,** ( सुसू. ४६.२०२-२०४ ) **छेदनः** ( असंसू. १२ ); **तांबूलद्रव्येष्वेकम्** ( चसू. ५.७७ )

हिं.— कपूर, कापूर.
म.—कापूर.
गु.—कपूर.
बं.—कर्पूर.
त.—कर्पूर.
फा. कफूर.

कापूर. एक सुगंधी द्रव्य. पांढरा डिंकरूप ज्वालाग्राही पदार्थ. जेवणानंतर होणाऱ्या कफनाशनाकरिता उपयोग केला जातो. **गुण**–तिखट, कडू, गोड, थंड, डोळ्याला हितकर, मद आणणारा, तहान चरबी व विषनाशक, तोंडाला येणारे पाणी, दुर्गंधिनाशक, तोंड सुकणे, बेचव असणे यावर दोषाचा छेद करणारे व विड्यात घालावयाच्या द्रव्यांपैकी एक द्रव्य.

–**गन्धिनी**–स्त्री., **सुगन्धिकन्द० ' आंबाहलदी ' ( हजारी ) लोके** ( र. १०.९१ )

आंबेहळद. एक सुगंधी कंद.

–**निर्यास**–पु., **निर्यास० कर्पूरः** ( चसू. ५.७७ )

कापूर एकसार शिरा.

–**मूली**–स्त्री., **वनस्पतिमूल० कर्पूरगन्धिनी** ( र. ३०४५ ) एक वनस्पती.

**कर्बुदार**–पु., **वनस्पति० काञ्चनः चक्र** ( चसू. २७.९९ )

एक वनस्पती व कांचन

**श्वेतकाञ्चनः** ( चसू. ४.१३ )

**वमनोपगणे एकं द्रव्यम्**

पांढरा कांचन.

वामक औषधांना उपकारक द्रव्यगणापैकी एक द्रव्य

**काञ्चनारः** ( चक. १.१४ )

**वसन्ते जातपुष्पः**

कांचन. याला वसंतात फुले येतात.

**श्लेष्मातकः** ( सुसू. ३९.३ ) भोकर. गोंदाणी.

**श्लेष्मातकभेदः** ( सुसू. ४६.२४९ )

भोकराचा प्रकार.

**नीलझिण्टी** ( असंचि. ९ ) नीलझिंटी.

–**तैल**–न., **सिद्धतैल० मधुरतैलवर्गे एकम्** ( सुसू. ४५.१२०

एक सिद्ध तेल. गोडे तेल वर्गापैकी एक.

**कर्बुदाराङ्कुर**–पु., **काञ्चनाङ्कुरः** ( सुउ. ४७.४६ )
कांचनाच्या कोवळ्या ढिऱ्या.

**कर्बुदारक**–पु., **वनस्पति० श्लेष्मातकः** ( रा. ११.१४८ )
भोकर. एक वनस्पती.

**कर्बुर**–वि., **शबलम् चित्रवर्णम्** ( र. २.५८ )
चित्रविचित्र रंगाचा.
पु., **वनस्पति० पौण्ड्रक इक्षुभेदः** ( रा. १४.१८३ )
**द्र० 'इक्षु'**
एक वनस्पती. उसाचा एक प्रकार. कचोरी. आंबेहळद. धोत्रा कमळकंद.
न., **खनिज० सुवर्णम्** ( रा. १३.२ ) सोने.

**( कर्बुरा )**–स्त्री., **कीट० सविषजलौकाभेदः**
**सा वर्मिमत्स्यवदायता छिन्नोन्नतकुक्षिश्च जलौका** ( सुसू. १३.११ )
एक किडा. विषारी जळूपैकी एक प्रकार. वर्मी माशासारखी लांब कापलेली व वर उचलून आल्यासारखी कूस असलेली जळू.

**–फल**–पु., **वनस्पति० साकरुण्डः** ( रापरि. ६.१६ )
वनस्पती एक गाठाळ फळ.

**कर्मन्**–न., **क्रिया, चलनम्** ( चसू. १.५२ )
**स्पन्दनगमनादिका चेष्टा, प्रयत्नवाङ्मनःशरीरप्रवृत्तिः** ( चसू. ११.३९ )
हालचाल, काम करणे, जाणे येणे इत्यादि क्रिया. प्रयत्न वाचा मन व शरीर यांची प्रवृत्ती.
**द्रव्याणि यत्कुर्वन्ति तत् भेषजद्रव्यव्यापारः शोधनादिः** ( सुसू. ४१.५ )
द्रव्ये जे करतात ते औषधिद्रव्यांचे कर्म वांती होणे इत्यादी.
**चिकित्सा** ( सुसू. ५.३ )
उपचार करणे.
**पञ्चकर्म** ( चसि. १.३ )
वांती, रेच, डोक्याचे रेच,
**रक्तस्रावनिरूहबस्तिसंस्कारः** ( सुसू. २०.१४ )
द्रव्यांवर काही गुण उत्पन्न व्हावे व अवगुण नष्ट व्हावे म्हणून करावयाच्या क्रिया द्रव्यात असलेली क्रिया, व्यापार.
**वैशेषिकदर्शनोक्तपदार्थेष्वेकः** ( चसू. १.२८ )
**संयोगे च विभागे च कारणीभूतो द्रव्यनिष्ठः ( पदार्थेषु परिगणितः ) व्यापारः** ( चसू. १.५२ )
वैशेषिक दर्शनाने सांगितलेल्या पदार्थांपैकी एक. संयोगविभागाला कारणीभूत म्हणून करावयाच्या क्रिया द्रव्यात असलेली क्रिया–व्यापार.

**जन्मान्तरकृतं कारणम् अदृष्टम्** ( चसू. ११.१२ )
मागील जन्मातले केलेले. दैव.

**( कर्म )–ज रोग**–पु., **कर्म-पूर्वजन्मकृतं पापपुण्यादिः तज्जो रोगः** ( चसू. २५.१९ )
कर्माचा रोग; कर्माचा भोग. कर्म–पूर्वजन्मी केलेले पापपुण्य. पापांपासून झालेला रोग.

**–निष्ठा**–स्त्री., **कर्मणो निष्ठा–निष्पत्तिः क्रिया परिसमाप्तिः** ( चसू. २६.६६ )
कर्माची उत्पत्ति. क्रियेची परिसमाप्ति.

**–पथ**–पु., **क्रियामार्गः** (सुसू. ९.३ )
चिकित्सेचा मार्ग.
**आचारः। दशधर्मपथान् रक्षन् जयन्नाभ्यन्तरानरीन्।**
**हिंसास्तेयान्यथाकामं पैशुन्यं परुषानृतम् ।**
**संभिन्नालापं व्यापदमभिध्यां दृग्विपर्ययम् ।**
**पापं कर्मेति दशधा कायवाङ्मानसैस्त्यजेत् ॥**
( असंसू. ३.११६–११७ )
आचार, आहार विहार, हे दहा धर्ममार्ग आहेत. शिवाय पुढील दहा पापमार्गांपासून आपले रक्षण करून आपल्या कामक्रोधादि अंतःस्थ शत्रूंना जिंकावे. ( १ ) हिंसा ( २ ) चोरी करणे ( ३ ) पशु, परस्त्रीगमन इत्यादी ( ४ ) निंदा करणे ( ५ ) दुसऱ्याला मर्म–भेदक बोलणे ( ६ ) कठोर बोलणे ( ७ ) असत्य बोलणे ( ८ ) असंबद्ध बोलणे-बडबड करणे ( ९ ) दुसऱ्याचे अनिष्ट चिंतणे. ( १० ) शास्त्र, तज्ज्ञ यांवर अविश्वास. हे दहा अंतःशत्रूचे मार्ग. पहिली ३ शारीरिक पापे. दुसरी चार वाचेची आणि तिसरी तीन मानसिक पापे होत.

**–पुरुष**–पु., **कर्मफलभाक्पुरुषः–पंचमहाभूतशरीरिसंयोगेन संजातः चिकित्साधिकृतः पुरुषः**, ( सुशा. १.१६ ) **तस्य गुणाः सुखदुःखे इच्छाद्वेषौ प्रयत्नः प्राणापानावुन्मेषनिमेषौ बुद्धिर्मनः सङ्कल्पो विचारणा स्मृतिर्विज्ञानमध्यवसायो विषयोपलब्धिश्च ।** ( सु. शा. १.१७ )
चांगल्या वाईट कर्माचे फळ भोगणारा पुरुष. पंचमहाभूते व आत्मा यांच्या संयोगाने झालेला चिकित्सेचे अधिष्ठान असलेला पुरुष. त्याचे गुण-- सुख, दुःख, इच्छा, द्वेष, प्रयत्न करण्याचा उत्साह, प्राणवायु, अपान वायु, डोळ्याची उघडझाप, बुद्धि मनाचा संकल्प, ऊहापोह, स्मरणशक्ति, शिल्पशास्त्रादिकांचे ज्ञान, बुद्धीचे व्यापार, शब्दादी विषयांचे ज्ञान. हे सोळा गुण आहेत.

**–फल**–न., कार्यफलम्, कर्मणः परिणामः शुभाशुभ-स्वरूपः ( चवि. ८.३७ )
कर्माचे चांगले वा वाईट फळ.
**यस्य कर्मफलस्य आसक्तिर्न विद्यते तस्य कर्मणः फलं न भवति इति सांख्ये सिद्धान्तः, ' न मुक्तः कर्म आनुबन्धिकं कुरुते निःस्पृहत्वात् ।**
( चवि. ८.३७ )
कर्माच्या फलाची आसक्ति ज्याला नसते, त्याच्या कर्माचे फल त्याला होत नाही. त्याचे पापपुण्य त्याला नाही असा सांख्यशास्त्राचा सिद्धांत आहे. मुक्त निःस्पृह असल्यामुळे त्याला बंधन--कारक होईल असे कर्म तो करीत नाही.

**–बस्ति**–पु., बस्तिप्रकार० प्रागेकस्नेहबस्तिरन्ते पञ्चस्नेहास्तथा निरूहा द्वादश सहानुवासना इत्येवं त्रिंशद्वस्तयः ' कर्म-बस्ति ' इत्युक्तम्
( अरु. अहसू. १९.६३ )
बस्ति कार्यक्रम. बस्ति सत्र. बस्तिमाला. बस्ति देण्याचा एक प्रकार. प्रथम एक स्नेह, नंतर निरूह अनुवासनासह, असे २४ नंतर पांच स्नेह ( अनुवासन ) असा एकंदर तीस बस्तींचा कार्यक्रम.

**–लोभ**-पु., कर्म-चिकित्साकर्म, तस्य लोभो वृत्ति-लोभ इत्यर्थः ( चसू. २९.९ )
चिकित्सा कर्माचा लोभ. निर्वाहाचा लोभ

**–विपत्ति**-स्त्री., चिकित्सितनाशः ( सुसू. २९.५ )
चिकित्सेची निष्फलता.

**–विभ्रम**-पु., कर्मण्यविज्ञानम्, यथा सौधं पयोऽज्ञ-प्रयुक्तं विषवद् हन्तीति ( सुसू. ४४.७९ )
कर्माचे अज्ञान. कोठे काय करावे याचे अज्ञान. जसे अज्ञानी मनुष्याने त्रिधारी निवडुंगाचे दूध दिले तर ते विषाप्रमाणे रोग्याचा नाश करील.

**–विरुद्ध**–न., संस्काराद्विरुद्धम् ( सुसू. २०.१४ )
संस्कार केल्यानंतर विरुद्ध दोषकर होणारे.

**–वैचित्र्य**–न., पूर्वजन्मकृतं वैचित्र्यम् अदृष्टम्
( असंशा. २.४६ )
पूर्वजन्मी केलेले निरनिराळे कर्म, पापकर्म. नशीब, दैव.

**–वैशेष्य**–न., कर्मवैशिष्ट्यम् ( सुशा. ९.३ )
विशिष्ट कर्म.

**–वैषम्य**–न., शारीरमानसवाङ्मयकर्मणो हीनमिथ्या-तियोगरूपम् ( र. २३.१–२ )
काया, वाचा व मन यांच्या कर्माचा हीन मिथ्या व अतियोग होणे. ही कर्मे कमी जास्त किंवा वाईट होणे.

**कर्मात्मन्**–पु., संसार्यात्मा ( चसू. २१.३५ )
इन्द्रियम् ( चसू. २१.३५ )
कर्म करणारा. इंद्रिये.

**कर्मेन्द्रिय**–न., कर्मण आश्रयभूतमिन्द्रियम् कर्मेन्द्रियाणि पञ्च । हस्तौ पादौ गुदमुपस्थं वाक्चेति । आहरण-गमनोत्सर्गहर्षविसर्गाश्चेति तेषां पञ्च क्रमेण कर्माणि । ( सुशा. १.४ )
कर्म करणारे इंद्रिय. कर्माचे आश्रयभूत इंद्रिय. ही पाच. दोन हात, दोन पाय, गुद जननेंद्रिय व वाचा. घेणे, जाणे, मल विसर्जन, आनंद व उच्चार ही क्रमशः ५ कामे त्यांची होत.

**कर्मर**–पु., वनस्पति० कर्मारकः ( रा. परि. ११.१३ )
एक वनस्पती. वेळू.

**कर्मर–क**–पु., वनस्पति० कर्मारकः ( रा. परि. ११.१२ )
वेळू. एक वनस्पती.

**( कर्मरी )**–स्त्री., वनस्पति० वंशरोचना ( रा. ६.८६ )
एक वनस्पतीचे अंग–वंशलोचन.

**कर्मार**–पु., वनस्पति० कर्मारकः ( रा. परि. ११.१३ )
करमर, कमरख.

**कर्मारक**–पु., न., वनस्पति० फलगुणाः–अम्लं उष्णं पित्तकरं वातहृत्, पक्वकर्मारं तु मधुराऽम्लं बल-पुष्टिरुचिप्रदम् ( रा. परि. ११.१३ )
हिं.—कमरख
**म.—करमर, कमरख**
गु.—कमरख
बं.—कमरंग
ता.—तमरताई
फळाचे गुण–**कच्चे**–आंबट उष्ण वातहारक, पित्तकारक. **पिकलेले**–गोड, आंबट, रुचकर, बल-वर्धक, पौष्टिक.
लोहकारः ( सुसू. ८.१९ )
लोहार.

**कर्वट**–न., कुरुक्षेत्रात्पूर्वदेश० ( काखिल. २५.९ )
कुरुक्षेत्राच्या पूर्वेकडचा देश.

**कर्शन**–न., कृशीकरणम् ( अहसू. ५.५६ )
कृश करणे, कृश करण्याचे उपाय.
( परिव० ) लङ्घनम्, उपवास ( सुशा. ३.१६ )
लंघन–उपास.

**कर्ष**–पु., न., मान० द्वौ द्रङ्क्षणौ, ' विद्याद् द्वौ द्रंक्षणौ कर्षं सुवर्णं चाक्षमेव च ' शाणचतुष्टयम् (असंक. ८)
सार्धद्वयप्रमाणधरणम् ( सुचि. ३१.७ )

**कलाप**–पु., समूहः, ( चचि. ४.१०८ ) ( असंचि. ९ )
समूह, गट, गण.
**वनस्पति० गण्डदूर्वा** ( ध. ४.१४५ )
एक वनस्पती, गाठी दूर्वा.

**कलापिन्**–पु., पक्षि०, मयूरः ( र. १०.९० )
एक पक्षी, मोर

**( कलापिनी )**–वनस्पति० मुस्तभेदः, नागरमुस्ता, द्र० 'मुस्त' ( रा. ६.६२ )
एक वनस्पती, नागरमोथा प्रकार.

**कलाय**–पु., शिम्बीधान्य०, स द्विविधः, त्रिपुटो वर्तुलश्च ( सुसू. ४६.३० ) गुणाः–वर्तुलकलायस्तिक्तः शीतः कटुपाकश्च ( चसू. २७.९७ ) त्रिपुटकलायः परमवातलः ( चसू. २७.२९ ) कलायः पूयवर्धनो व्रणदुष्टिकरश्च । व्रणिनामहितः
( सुसू. १९.१६ )
**अयं मधुरः शीतो रूक्षो लघुर्ग्राही वातकरो रुच्यः पुष्टिदः कफपित्तघ्नो दाहविनाशकरश्च**
( ध. ६.१०३ )
**आमदोषकरश्च** ( रा. १६. १६५ )
हिं.—मटर, कैराव.
म.—**वाटाणा**
गु.—वटाणा
बं.—वांटुला मटर
त.—पटाणी
एक शेंग, धान्य, वाटाणा प्रकार २–वाटोळा व त्रिकोणी. वाटोळा–कडू, थंड, पचल्यानंतर तिखट. त्रिकोणी–अति वातुळ, व्रणदुष्टकर, पू वाढवणारा, गोड, थंड, रूक्ष, हलका, मळ घट्ट करणारा, वातवर्धक, रुचकर, पौष्टिक, कफपित्तनाशक व दाहनाशक, आमदोषकर.

**( कलाया )**–स्त्री., वनस्पति० गण्डदूर्वा ( रा. ८.२३५ )
गांठी दूर्वा.

**–खञ्ज**–पु., वातरोग०, संप्राप्तिः–प्रकुपितो वातः सक्थिकण्डराद्वयसंधिबन्धनशैथिल्यं कृत्वा कलायखञ्जरोगं करोति। लक्षणम्–यस्तु प्रक्रामन् वेपते खञ्जन्निव च गच्छति तं मुक्तसंधिप्रबन्धनं रोगं विद्यात् ( सुनि. १.७८ )
एक वातविकार. कुपित वात मांड्यांच्या कण्डरा व संधिबंधने शिथिल करून हा रोग करतो. लक्षण–हा रोगी चालताना कापतो व लंगडत लंगडत असा चालतो.

**–शाक**–पु., शाक०, त्रिपुटकभेदः, गुणाः–कषायो मधुरपाकी गुरुः कफपित्तघ्नः वातलश्च
( सुसू. ४६.२४८ )
एक भाजी. वाटाण्याचा प्रकार. तुरट, पचल्यानंतर गोड, जड, पित्तवातनाशक, वातूळ.

**कलाह्व**–पु., वनस्पति० ( रा. ११.५२ )
काटेटेंभुर. टेंभूर.

**कलि**–पु., कलिपुरुषः, देवताविशेषः ( चसू. ५.९८ )
कली. कलिपुरुष. एक देवता.
स्त्री.,–**रेवतीग्रह० सा चतुर्थेऽहनि अपत्यं विनाशयति** ( का. रेवती क. ४५ )
एक रेवतीबालग्रह. तो चवथ्या दिवशी मुलाला मारतो.

**–कलहशील**–वि., कलिर्वाचिकः, कलहस्तु शारीरिकः तत्परशीलं स्वभावो यस्याः सा ( चशा. ८.२१ )
कलि म्हणजे तोंडाने भांडण. कलह म्हणजे मारामारी करणे. भांडण करण्याचा जिचा स्वभाव आहे ती.

**–तरु**–पु., वनस्पति० भल्लातकः, ( असंचि. २२ )
बिब्बा. भिलावा. एक वनस्पती.
**बिभीतकः** ( वैशसिं. ) बेहेडा.

**–द्रुम**–पु., वनस्पति० बिभीतकः ( ध. १.२१२ )
एक वनस्पती. बेहेडा.

**–माल**–वनस्पति० उदकीर्यः, पूतिकरञ्जः
( रा. ९.१८० )
एक वनस्पती, घाणेरा करंज.

**कलिक**–पु., वनस्पति० अशोकः ( रा. १०.२७० )
एक वनस्पती, अशोक.

**( कलिका )**–स्त्री., वनस्पति० वृश्चिकाली
( रापरि. ९.८ ) एक वनस्पती, विंचवी.

**कालिकारी**–स्त्री., वनस्पति०, गुणाः–कट्वी तिक्ता उष्णा सरा कफवातघ्नी श्वयथुगर्भशल्यव्रणापहा
( ध. ४.९ )
हिं.—कलिहारी
म.—**करिया नाग.**
गु.—खड्या नाग
बं.—बिशलांगुलि
त.—अक्किनिविलम्
एक विषारी वनस्पती. खड्या नाग. कळलावी. गुण–तिखट, कडू, उष्ण, सारक, कफवातनाशक, सूज, व्रण, शल्यरूप गर्भनाशक.

**कलिङ्ग**–पु., न., वनस्पति० **अलाब्वाकारं मधुरफलम् ' तद्गुणाः–मधुरः शीतो वृष्यः सन्तर्पणो बल्यो वीर्यपुष्टिवर्धनः पित्तघ्नो दाहश्रमघ्नः**
( रा. ७.२७१ )
वातकृत् ( असंनि. १.१५ )
हिं.––तरबुज, हिन्दोना, जमाऊका.
म.––**कलिंगड, टरबूज.**
गु.––तरबूज, तडबूब; करिंगु.
बं.––तरमूज.
त.––चक्करै, क्कुम्मट्टि, पिच्चापलं.
एक वनस्पती, कलिंगड, टरबूज.
**गुण**––गोड, थंड, शुक्राला हितकर, तृप्तिकर, पौष्टिक, बलवर्धक, पित्तनाशक. दाह श्रम नाहींसे करते. वातकर.
पु., वनस्पति० **शिरीषः** ( रा. ९.१८९ ) शिरस.
वनस्पति० **कुटजः** ( ध. २.१३ ) कुडा.
स्त्री., वनस्पति० **कर्कटशृङ्गी**
( र. १८.१०९–११० )
एक वनस्पती, काकडशिंगी.
देश० **कुरुक्षेत्रात् पूर्वदेशविशेषः** ( काखिल. २५.९ )
कुरुक्षेत्राच्या पूर्वेकडचा देश. जगन्नाथपुरीपासून दक्षिणेकडे कृष्णाकाठापर्यंतचा प्रदेश.
**–बीज**–न., वनस्पति० **इन्द्रयवः** ( रा.९.२२ )
एक वनस्पती, इंद्रजव.
**–यव**–पु., वनस्पति० **इन्द्रयवः** ( चचि. ७.९१ )
एक वनस्पती. इंद्रजव.

**कलिङ्गक**–न., फल० **कलिङ्गम्** ( र. ११.१२९ )
एक फल, कलिंगड, टरबूज.
वनस्पति० **इन्द्रयवः** ( चक. ५.४ ध. २.१५ )
इंद्रजव.

**कलु**–पु., धान्य० **व्रीहिभेदः** ( रा. १६.११३ ) द्र० ' **व्रीहि** '
एक धान्य, तांदुळाचा प्रकार.

**कलुष**–वि., **अस्वच्छम्, मलिनम्** ( अहृसू. ५.६६)
अस्वच्छ, मळकट, गढूळ.
**–पारावत**–पु., **मण्डलिसर्प०** ( सुक. ४.३४ ( २ )
अंगावर मंडले असलेला साप. घोणस.
**–भोजन**–न.. **समलभोजनम्**, ( सुउ. ६२.६ )
घाण असलेले जेवण. केरकचरा, केस पडलेले अन्न.

**कलुषीकृत**–वि., **संसृष्टः**, ( चशा. ४.९ )
घाण केलेले. घाण मिसळलेले.

**कलेवर**–न., **शरीरम्**, ( असंशा. ५.१०४ ) शरीर.

**कलोड्य**–न., **पद्मबीजम्**, ( अहृसू. ६.९२ )
कमळाचे बी. कमळकाकडी.

**कल्क**–पु., कल्प०, ( चसू. ४.७ ) **दृषदि पेषितं सद्रवं द्रव्यम्**, ( सुउ. ५८.२७ ) आलेप० **शुष्कं द्रव्यं द्रवेणाऽऽप्लुत्य पिष्टम् । चूर्णीकृतमार्द्रमौषधिद्रव्यम्**
( सुसू. ५.६ )
कोरडे द्रव्य पाण्यात बुडवून ( भिजवून ) वाटलेला गोळा, चटणी. वाटलेला ओला पदार्थ.
वनस्पति० **बिभीतकः**, ( ध. १.२१२ ) बेहेडा.
सुगन्धिद्रव्य०, **तुरुष्कः**, ( ध. ३–२२ ) ऊद, धूप.
**–पेष्य**–वि., **कल्कस्वरूपप्राप्तिपर्यन्तं द्रव्यस्य पेषणं क्रियते तत्**, ( सुचि. ९.६१ )
पाट्यावर वाटण्यासारखे द्रव्य. चटणी होईपर्यंतचा वाटलेला पदार्थ.
**–फल**–पु., वनस्पति० **दाडिमः**, ( र.२.७२ )
एक वनस्पती, डाळिंब.
**–बन्ध**–पु., पारदबन्ध० **स्वेदनमर्दनादिभिः साधितः सन् पङ्कत्वं प्राप्तः पारदः । चुल्लीस्थे लौहे कटाहे मयूरतुत्थकृतालवालके गङ्गापत्रीस्वरसं पारदं च प्रक्षिप्य यथा पारदो रसमग्नः स्यात्तथा रसमन्तराऽन्तरा दत्वा मन्दाग्निना चतुष्प्रहरपर्यन्तं पाचयेत्ततो निम्बूरसेन क्षालयेत् । एवं स्वेदेन पारदः पङ्कवद्भवति ।** ( र. ११.७४ )
एक पारदबंध. स्वेदन, मर्दन इत्यादि संस्कारांनी पारा चिखलासारखा होतो तो. चुलीवर लोखंडाची कढई ठेवून, मोरचुताचे आळे तिच्यात करून, त्यात पारा घालून, त्यावर गंगापत्रीचा रस पारा बुडेल व सतत राहील इतका पुन्हा पुन्हा घालीत रहावे. मंद अग्नीने चार प्रहरपर्यंत पचवावे. नंतर निंबाच्या रसाने तो पारा धुवावा म्हणजे चिखलासारखा थोडा घट्ट होतो. त्याला कल्पबंध म्हणतात.
**–रोध्र**–पु., वनस्पति०, **शाबरलोध्रः**,
( रा. ६.२४० )
एक वनस्पती. एक लोध्र. पांढरा लोध्र. बोयाड.

**कल्किधर्मघ्न**–पु., **बिभीतकः**, ( रा. ११.३२३ ) बेहेडा.

**कल्किवृक्ष**–पु. **बिभीतकः**, ( रा. ३२२ ) बेहेडा.

**कल्प**–पु., **कल्पना, विधिः**, ( चक. १.१ )
उपायांची कल्पना. उपायांचा विधिक्रम.
**सामर्थ्यम्**, ( र. १७.६८ ) बल, शक्ति.
**भ्रान्तिः**, ( र. १७.६८ )

भ्रम. जे असते त्यापेक्षा निराळे दिसणे–वाटणे.
**चरकसुश्रुतादौ स्थानविशेषः**
चरकसुश्रुत या ग्रंथातील विषयानुरूप एक भाग.
**योजना,** ( सुसू. ३.२८ )
उपाय, योजना. औषधांची कल्पना-ज्ञान.
**औषधियोग० औषधीनां संयोगेन केवलमेकमौषधं भावचूर्णनभस्मीकरणादिसंस्कारेण सिद्धम्,**
( र. ११.८८ )
औषधांचा योग. एका औषधात अनेक औषधे मिसळून, भावना देऊन, चूर्ण व भस्म इ. करून अमृतीकरण संस्काराने सिद्ध केलेला योग.

**–वैशेष्य**–न., **कल्पनावैशिष्ट्यम्,** ( चक. ७.६ )
कल्पनांचे वैशिष्ट्य.

**–स्थान**–न., **वमनविरेचनानां कल्पास्तिष्ठन्त्यस्मिन्निति**
( चक.१; सु; असं; अहृ; का. )
ग्रंथाच्या भागात--स्थानात वामक रेचक इत्यादी कार्यकारी योगांचा–कल्पांचा संग्रह आहे ते स्थान--प्रकरण

**कल्पाङ्गिन्**–पु., **वनस्पति० पर्पटः,** ( रा. ५.६५ )
एक वनस्पती, पित्तपापडा.

**कल्पोपनिषद्**–स्त्री., **कल्प एव उपनिषद्, चरकसंहितायां कल्पस्थानम्,** ( चसू. ४.४ )
औषधि योगांचे--कल्पांचे रहस्य–तत्त्व ज्यात सांगितले आहे असा ग्रंथाचा विभाग. कल्पस्थान.

**कल्पन**–न., **छेदनम्** ( चशा. ८.४४ )
छेद करणे, कापणे, कातरणे.
**कल्पः, योगः, भैषज्यकल्पना** ( चचि. ३.१६२ )
औषधांचा काढा, चटणी इत्यादी प्रकार, योग, औषधि कल्पना.

**–विधि**–पु., **छेदनविधिः गर्भनाभिनाडीछेदनविधिः**
( चशा. ८.४४ )
कापण्याचा विधि. एकानंतर दुसरी अशा क्रमाने करावयाच्या क्रिया. गर्भाच्या बेंबीची नाळ कापण्याचा विधी.

**ना**–स्त्री., **योगः विधिः** ( सुउ. १८.८३ )
औषधांचा कल्प. औषध करण्याच्या-देण्याच्या क्रियांचा क्रम.

**–सिद्धि**–स्त्री., **कल्पनाशब्देनेह पञ्चकर्माङ्गकल्पनोच्यते तस्य सिद्धिः** ( चसि. १.१ )
पंचकर्मांची योजना. केलेल्या पंचकर्म योजनेची निरनिराळ्या अंगांची फलप्राप्ति.
**अध्याय०** ( चसि. १.१ )
एका अध्यायाचे नाव, यात पंचकर्माच्या अंगोपागांची माहिती आहे.

**कल्माष**–पु., **वनस्पति० शालिभेदः, गन्धशालिः**
( रा. १६.९३ )
एक वनस्पती. सुगंधी साळ-भात.

**कल्य**–वि., **नीरोगः** ( चवि. ८.७ ) निरोगी.
न., **प्रातः,** ( सुउ ५८.३९ ) सकाळ, प्रातःकाळ.

**कल्याण**–न., **खनिज०, सुवर्णम्,** ( रा. १३.१ )
खाणीतले सोनें.

**( कल्याणी )**–स्त्री., **वनस्पति० माषपर्णी**
( रा. ३.१७१ ) एक वनस्पती, रानउडीद.

**बीज**–न., **वनस्पती० मसूरिका** ( रा. १६. १४९ )
एक वनस्पती, मसूर.

**–मातृक**–वि., **कल्याणी माता यस्य सः, मृतमातृक इत्यर्थः,** ( कासलेहाध्याय पृ. ४ )
कल्याणी ज्याची आई आहे तो. आई ज्याची मेली आहे तो. निमाय लेकरू.

**–मित्र**–न., **कल्याणे शुभकर्मणि मित्रं–सहायः सन्मित्रमिति यावत्** ( अहसू. २.२१ )
कल्याणात्मक कार्यात मदत करणारा मित्र. सन्मित्र. चांगला मित्र, जानी दोस्त.

**कल्याणाभिनिवेश**–पु., **श्रेयस्करमार्गानुष्ठानम्**
( चवि.४.८ )
कल्याणकारी प्रयत्न करीत राहाणे.

**कल्याणाभिनिवेशिन्**–वि., **कल्याणविषये यत्नपरः सत्त्वसारलक्षणेष्वेकं लक्षणम्** ( सुसू. ३५. १६ )
कोणाचेही कल्याणच व्हावे अशा वृत्तीचा–अशा वागणुकीचा–असा प्रयत्न करणारा. सत्त्वसारत्वाचे एक लक्षण.

**कल्याणक**–पु., **भैषज्ययोग० कल्याणकगुड इति नाम्नाऽपि प्रसिद्धः, मन्दाग्निकुष्ठकामलामेहग्रहणीपाण्ड्वादि रोगेषु प्रशस्तः** ( चक. ७.४० ४५ )
एक औषधि योग. कल्याणकगुड नांवाने प्रसिद्ध. मंदाग्नि. कुष्ठ, कावीळ, प्रमेह, ग्रहणी, पांडु इत्यादींवर चांगला.

**( कल्याणिका )**–स्त्री., **खनिज० मनःशिला**
( रा. १३.१५८ ) मनशीळ.
**कल्याणिका नाम रसक्रिया नेत्ररोगार्थमुपयुज्यते**
( काखिल. १३.७९.८० )

औषधींच्या आटलेल्या काढ्याचे नांव, ही नेत्ररोगावर उपयुक्त.

**-घृत**-न., घृत० एतज्जीर्णज्वरश्वासकासगुल्मोन्माद-गरान् हन्ति । अपस्माराग्निमान्द्यनुत्, क्लीबानां वन्ध्यानां क्लैब्यवन्ध्यत्वादिविनाशी, पाण्ड्वामयघ्नं बुद्धिप्रदं नयनहितं रेतोमार्गरुग्विनाशी गर्भप्रदं च (चचि. ९.३५-४१) (सुउ. ३९. २२५-२२९)

या नावाचे सिद्ध तूप. हे जीर्णज्वर, श्वास, खोकला, गुल्म, पांडु, उन्माद, कृत्रिमविषबाधा नाहीसे करते. अपस्मार नाशक, मंद अग्नी चांगला करते. वन्ध्यांचे वंध्यत्व व षंढांचे नपुंसकत्व नाहीसे करते. डोळे, बुद्धी यांना हितकर; शुक्रमार्गगतरोगहर, गर्भप्रद.

**-लवण**-न., योग० विसूचिकाऽलसकविलम्बिका वातव्याधिषूपयोज्यम् (सुउ. ५६.१६)

एक योग, अजीर्णाचे विषूचिका अलसक विलंबिका हे प्रकार नाशक व वातव्याधीवर उपयुक्त.

**कल्याणकावलेह**-पु., योग० सर्वातीसारनाशकः (काखि. १०.८८)

एक औषधियोग, सर्व अतीसारावर उपयुक्त.

**कल्याणिनी**-स्त्री., वनस्पति० (रा. ४.४२२)

एक वनस्पती, चिकणा, झिंझुरटी.

**कल्याणी**-स्त्री., वनस्पति० माषपर्णी (रा. ३.१७१)

रानउडीद.

**कवक**-न., वनस्पति० छत्रकं, सुखण्डकसंज्ञः छत्रकभेदः (सुसू. २०.८)

एक वनस्पती, अळंभे, अळभे, छत्री (कुत्र्यांची.)

**(कविका)**-स्त्री., कटकम् (डसुसू. २७.१४) लगाम. केविका (रा. परि. १०.३३)

एक वनस्पती, सुगंधी फुलांची.

**कवच**-पु., न., संनाहः (सुक. १.२५-२७ ड.) अङ्गत्राणम् (असंसू. ८.४३) चिलखत.

पु., वनस्पति० पर्पटः (ध. १.४५) पित्तपापडा.

**कवल**-पु., उपक्रमः गण्डूषभेदः (ड. सुउ. ६४.३८.३९) व्याख्या-मुखपूर्णे सति यः संचारयितुं शक्यते स कवल उच्यते । (अहृसू. २२.१२) अयं चतुः-प्रकारः स्नेही प्रसादी शोधनो रोपणश्च । चतुर्धा कवलः स्नेही प्रसादी शोधितरोपणौ । स्निग्धोष्णैः स्नेहिको वाते स्वादुशीतैः प्रसादनः । पित्ते कट्वम्ल-लवणै रूक्षोष्णैः शोधनः कफे । कषायतिक्तमधुरैः कटूष्णै रोपणो व्रणे ॥' धारणकालः तावच्च धारयि-तव्यः अनन्यमनसोन्नतदेहेन यावद्दोषपरिपूर्णकपो-लत्वं नासास्रोतोनयनपरिस्रावश्च भवति तदा विमो-क्तव्यः पुनश्चान्यो ग्रहीतव्यः । (सुचि. ४०.६३) शुद्धिलक्षणम्-समानयोगलक्षणानि व्याधेरपचयो वैशद्यं तुष्टिर्वक्त्रलघुतेन्द्रियप्रसादश्च (सुचि. ४०.६५)

अतियोगः-कवलस्यातियोगान्मुखे पाकः शोषस्तृष्णा-ऽरुचिः क्लमश्च भवति । (सुचि. ४०.६६) हीनयोगः-हीने कवले जाड्यकफोत्क्लेशावरसज्ञानं भवति । (सुचि. ४०.६६) कवलविषयाः 'मन्या-शिरःकर्णमुखाक्षिरोगाः प्रसेककण्ठामयवक्त्रशोषाः । हृल्लासतन्द्रारुचिपीनसाश्च विशेषात्कवलग्रहेण साध्याः (अहृसू. २२.१२) मुखरोगे दोषादिविभागेन उपयुक्ताः कवला दोषं वीक्ष्य क्षीरेक्षुरसगोमूत्रदधिमस्त्वम्लकाञ्जिकैः तैल-घृतैरपि कवलान् विदध्यात् ॥' (सुचि. २२.७६) कवलोऽपूर्णपञ्चसंवत्सरे बाले न प्रयोज्यः । (असंसू. २९.२२)

एक उपचार. औषधी गुळण्यांचा प्रकार. तोंडातील पाणी खुळखुळता येईल, इकडून तिकडे हालविता येणारी तोंडातील चूळ. प्रकार ४-**स्नेही** प्रसादी, शोधन, रोपण. **स्नेही**-वातावर स्निग्ध व उष्ण द्रव्यांनी. **प्रसादी**-पित्तावर गोड व थंड द्रव्यांनी. **शोधन**-कफावर तिखट, आंबट, खारट व रुक्ष, उष्ण द्रव्यांनी. **रोपण**-व्रणावर तुरट, कडू, गोड, तिखट व उष्ण द्रव्यांनी. कवळ धरून ठेवण्याचा काळ-दोषांनी तोंड पुरे भरणे व नाक डोळे ओले होणे. तोंडातील चुळेकडे लक्ष देणाऱ्या व मान ताठवलेल्या रोग्याच्या दृष्टीने हा काळ आहे. नंतर त्याने चूळ काढून टाकावी व पुन्हा भरावी. शुद्धीचे लक्षण-समयोगाचे लक्षण-रोग कमी होणे, तोंड स्वच्छ व हलके होणे, बरे वाटणे, इंद्रिये प्रसन्न होणे. अती झाले तर-तोंड येते, सुकते, तहान लागते, थकवा येतो, चव नसते. कमी उपचार झाला तर जडत्व, कफ उचंबळून येतो. रस कळत नाही. उपचाराचे रोग-मान, डोके, कान, तोंड, डोळे, गळा यांचे रोग. तोंडाला पाणी सुटणे, तोंड सुकणे, घशाशी येणे, झापड, जुने पडसे, चव नसणे यांवर शिवाय मुखरोगात दोषांचा विचार करून उपयुक्त. **द्रव्ये**-दूध, उसाचा रस, गोमूत्र, दही, दह्याची निवळ, आंबट कांजी, तेल,

तूप यांचे कवल धरावे. पांच वर्षांच्या आतील मुलांना हा उपचार वर्ज्य.

**( कवलिका )**-स्त्री., **व्रणकल्कौषधाच्छादनद्रव्यम्, सा चौषधस्वरसनिस्सरणनिवारणार्थं पलाशोदुम्बरादीनां त्वक्पत्रादिकृता** ( ड. सुसू. ५.१७ )
व्रणावर औषधाची चटणी, औषध लावल्यावर आच्छादनाकरिता, पातळ औषध तेथेच रहावे म्हणून पळस, उंबर यांची साल, पान, कापूस यांची चकती.

**-ग्रह**-पु., **उपक्रम०, गण्डूषभेदः कवलस्य धारणम्** ( सुउ. ५३.८ )
एक उपचार, गुळणी धरणे.
**मान० कर्षपर्यायः, द्वौ द्रङ्क्षणौ कवलग्रहं विद्यात्** ( चक. १२.९१ )
प्रमाण. माप, तोळा. २ द्रंक्षण=१ तोळा. यालाच कवलग्रह हे नाव आहे.

**कवलालुक**-न., **वनस्पति० घोली** ( रा. परि. ७.८७ )
घोल.

**कवलित**-वि., **ग्रासीकृतम्** ( र. १.४२ )
घास घेतलेले अन्न.

**कवाट**-पु., न., **कपाटः** ( असंसू. २१.४ कपाट )

**कवोष्ण**-वि., **ईषदुष्णम्** ( असंचि. १० )
कोमट, सोमट.

**कव्य**-न., **पितृदेयम्** ( असंउ. ४२ )
पितरांना देण्याचे अन्न.

**कशा**-स्त्री., **चर्मयष्टिः** ( ड. सुउ. ६२.१८ )
चामड्याची काठी, दोरी, चाबूक.

**कशेरुक**-पु., न., **तृण० क्षुद्रमुस्ता** ( चचि. २९.५८ )
एक गवत, लहान नागरमोथा.
**चिञ्चोडका शाक०** ( चसू. २७.११६ )
एक भाजी, नागर मोथ्यासारखी. अल्प पाळे असलेला कंद.
**मधुरस्कन्धे द्रव्यविशेषः** ( चवि. ८.१३९ )
मधुर वर्गातील एक.
**मागधम्** ( अरुण. अहसू. ६.९२ ) एक वनस्पती.
**गुण्डकन्दः** ( चसू. ३.२१ ) एक वनस्पती.
**सरक्ते पवने प्रदेहार्थं देयम् ।**
रक्तासह वातदुष्टि असताना लेपाकरिता उपयुक्त.
**कसेरुकगुणाः-कषायोऽल्पमधुरः शीतोऽतिखरः रक्तपित्तप्रशमनः दाहश्रमापहः ॥** ( रा. परि. ८.६४ )
**गुण**-तुरट, थोडा गोड, थंड, अतिशय खरखरीत, रक्तस्राव कमी करणारा, दाह व श्रम नाशक.
**गुरु विष्टम्भिशीतौ च शृङ्गाटककशेरुकौ** ( सुसू. ४६.३०४ )
शिंगाडे व कशेरुक कंद-जड, मलावरोधक व थंड.
**लोमशकृष्णवर्तुलसूक्ष्मस्तडागकन्दः** ( हे. अहसू. ६.९२ )
लव असलेला, काळा, लहान वर्तुळे असलेला, तलावात होणारा कशेरु कंद.
**गर्भस्थापनार्थं उपयुक्तः, "शृङ्गाटकपुष्करबीजकशेरुकान् भक्षणार्थं दद्यात् ।"** ( चशा. ८.२४ )
**शिरःपार्श्वांसशूलेषु प्रलेपने** ( चचि. ८.८४ )
कशेरु गर्भस्थापन करणारा आहे. शिंगाडा, पुष्करबीज, कशेरु हे खाण्याकरिता द्यावेत. डोळे, फासळ्या व अंस यात शूल असला तर याचा लेप करावा.

**कश्यप**-पु., **महर्षि० हिमालये इन्द्रादेशात् रसायनप्रयोगं कृतवान्** ( चचि. १. ( ४ ) ३ )
**रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः** ( चसू. १.८ )
एक महर्षि. याने इंद्राच्या आदेशाप्रमाणे रसायन प्रयोग केला. रोगनाशनाचा विचार करण्याकरिता हिमालयाजवळ जमलेल्या महान ऋषींतील एक.
**काश्यपसंहिताकारः ऋषिः** ( कासू. २७.३ )
काश्यपसंहिता करणारे ऋषि.
**काश्यप एवाग्रे तपसोऽग्रेणाविन्दत रेवतीम्** ( काक्र. रेवतीक. ६२ )
काश्यपानेच प्रथम उग्र तपाने रेवतीला प्रसन्न केले.
**इन्द्रशिष्यः** ( कावि. ) इंद्राचा शिष्य.

**कषाय**-पु., **रस० षड्रसेष्वेकः, कफपित्तप्रशमनः** ( चसू. १.६६ )
**वायूर्व्योर्बाहुल्यात्कषायरसो भवति ।** ( सुसू. ४२.३ )
**कषायरसलक्षणम्-स वक्त्रं परिशोषयति जिह्वां स्तम्भयति कण्ठं बध्नाति हृदयं कर्षयति पीडयति च** ( सुसू. ४२.९ ) **गुणाः-संशमनः संग्राही संधानकरः पीडनो रोपणः शोषणः स्तम्भनः श्लेष्मरक्तपित्तप्रशमनः शरीरक्लेदस्योपयोक्ता रूक्षः शीतो लघुश्च** ( चसू. २६.४३ ) **शोधनो लेखनः क्लेदोपशोषणः** ( सुसू. ४२.१० ) **रूक्षगुणत्वात्**

विशोषिभावाच्च पित्तस्य द्रवगुणस्य ह्रासकः
( काखि. ६.२९-३० )
त्वक्प्रसादनोऽस्रविशोधनश्च ( अहृसू. १०.२० )
अपवादः-प्रायः कषायशीतं स्तम्भनं चान्यत्र हरीतक्याः ( असंसू. १८.२६ ) कषायरसस्याधिकाऽभ्यासे कफपित्तक्षयो वायोः प्रकोपः पक्तिमार्दवं रक्तशान्तिश्च भवति । ( काखि. ५.४७ )
कषायरसोऽत्यर्थमुपयुज्यमानः आस्यं शोषयति, वाचं निगृह्णाति, हृदयं पीडयति, उदरमाध्मापयति, स्रोतांस्यवबध्नाति, श्यावत्वमापादयति, पुंस्त्वमुपहन्ति, विष्टभ्य जरां गच्छति, वातमूत्रपुरीषरेतांस्यवगृह्णाति, कर्षयति, ग्लपयति, तर्षयति, स्तम्भयति, खरविशदरुक्षत्वात् पक्षवधग्रहापतानकाऽर्दित-प्रभृतींश्च वातविकारानुपजनयति । ( चसू. २६.४३ ) कषायस्कन्धः-हरीतकी-प्रियङ्ग्वनन्ताक्षौद्र-लोध्रकट्वङ्ग-कट्फल-धव-धन्वन-धात्रीफल-धातकीपुष्प-पद्मा-पद्मक-पद्मपुष्प-नागकेसर-कुमुदोत्पल-तुङ्ग-तिन्दुक-कदम्बोदुम्बर-प्लक्ष-वट-बिभीतक-विकङ्कत-जम्ब्वाम्रास्थ्याम-कपित्थाऽश्वत्थ-मोचरस-समङ्गा-सोमकल्प-सप्तपर्ण-स्यन्दना-ऽसन--सल्लकी-शाल-ताल-पियालैलवालुक-परिपेलव-जिङ्गिणी-बदरी-खदिर-कदराऽरिमेद-कास-कसेरुक-वंशाऽश्मन्तकाऽशोक-शिरीष-शिंशपा-पलाश-शमी-शण-शङ्खनाभि-मेषशृङ्गी-वरुण-खर्जूर-स्फूर्जक-सर्ज-भूर्जार्जुना-ऽऽजकर्ण-प्रवाल-मुक्ताञ्जन-गैरिक-बिस-मृणाल-प्रभृतीनि ( असंसू. १८.२५ )
तुरट रस. सहा रसांपैकी. वायू पृथ्वी यांच्या आधिक्याने तुरट रस होतो. **लक्षण**-तोंड सुकवितो, जीभ ताठरते, कंठात बांध बसल्यासारखे होते, हृदयात वेदना होतात व तेथे ओढ लागते. गुण-दोषांचे शमन, मळ बांधणे, जखम भरून आणणे, जखम आवळणे, रुजवणे, सुकवणे, शरीराबाहेर जाणारे दोष थांबवणे. इत्यादि क्रिया करतो. कफ व रक्तपित्त दोष घालवणारा, शरीरातील आर्द्रतेचा योग्य उपयोग करणारा, रूक्ष थंड व हलका आहे. दोष खरडून काढणारा व क्लेदशोषक आहे. रूक्षगुणाने व शोषकधर्माने द्रवगुणी पित्ताचा ऱ्हास करतो. त्वचा सुंदर करतो. रक्तशुद्धि करतो, कषाय रस स्तम्भक आहे. पण अपवाद, हिरडा-हा रेचक आहे. आधिक्याचे परिणाम-कफ पित्तक्षय, वातप्रकोप, भूक मंद होते. रक्तप्रकोप कमी होतो, तोंड सुकते, बोलणे अडखळते, हृदयात पीडा, पोटफुगी, स्रोतसे संकुचित होतात. काळसरपणा अधिक येतो, पुरुषत्व कमी होते, अन्न पोट फुगून जिरते. वात मूत्र पुरीष व शुक्र यांच्या प्रवृत्ति कमी होतात. कृशता, ग्लानि, तृषा, उत्पन्न करतो, अवयवात ताठरपणा निर्माण होतो. खरखरीत, रूक्ष, विरल या गुणामुळे अर्धांगवात, शरीर जखडणे, आचके, तोंड वाकडे होणे इत्यादी वातरोग निर्माण होतात. **गण**-हिरडा, गव्हला, धमासा, मध, लोध्र, टेंटू, कायफळ, धावडा, आवळकटी, धायटीफूल, मंजिष्ठा, भार्गी, पद्मकाष्ट, कमळ, नागकेशर, तांबडे व पांढरे कमळ, हळद, वंशलोचन, टेंभूर, कळंब, उंबर, पिंपरी, वड, बेहडा, बेहळी, बेहाळ, जांभूळ, आंब्याची कोय, कच्चे कवठ, पिंपळ, सावरीचा डिंक, लाजाळू, सोमकल्क, सातवीण, तिवस, असाणा, साळाई, साग, ताड, चारोळी, कवठासारखे खरबूज, नागरमोथा, काळी सावरी, बोरीची पाने, साल, खैर, पांढरा खैर, वेहेकळ, काशदर्भ, कसेरुक, बांबू, आपटा, अशोक, सीरस, सीसव, पळस, शमी, सण, शंखाची गाठ, मेढशिंगी, वायवर्णी, खजूर, टेंभुरणी, राळ, भूर्जपत्र, अर्जुनसादडा, आजवला, प्रवाळ, मोती, सुरमा, गेरू, कमळाचा देठ.

पु., **मण्डलीसर्पः** ( सुक. ४.३४ ( २ )
घोणस. गोल मंडले असलेला.

पु., **क्वाथः** ( चसू. ४.३ ) काढा.

पु., **वनस्पति० सर्जकः** ( ध. ५.१२३ ) राळ.

**धवः** ( रापरि. ९.८ ) धावडा.

**( कषाया )**-स्त्री., **अम्बष्ठा** ( ध. ३.११६ ) पहाडमूळ
**खर्जूरी** ( ध. ५.५३ ) खजूर
**धन्वयासः** ( र. ३.२३ ) धमासा.

**-दन्त**-पु., **मूषिका०, दष्टलक्षणम्-निद्रा हृच्छोषः कार्श्यं च जायते ।** ( सुक. ७.१९-२० )
एक उंदीर. दंशलक्षणे - झोप, कृशता, तोंड, छाती, या भागात सुकावा.

**-द्रुम**-पु., **कषायरसोत्कटो वृक्षः न्यग्रोधादिः** ( चशा. ८.२४ )
तुरट रसाची ( वड इ० ) झाडे.

**-यावनाल**-पु., **वनस्पति० तुवरयावनालः** ( ध. १६.१७१ ) तुरट जोंधळा.

**-रक्त**-वि., **कषायभावनया रक्तीकृतः** ( चक्र चसि. ११ )

तुरट द्रव्यांची भावना देऊन लाल केलेले.

**-रसता**-स्त्री., **कषायरसास्वादत्वम्** ( अरु ) **रसान्तरेऽपि कषायग्रहणम्** ( हे अहृसू. १२.५१ )
तुरट रसाचा स्वाद असणे. तोंड तुरट असणे.

**-वर्ण**-पु., **गैरिकवर्णः रक्तवर्णो वा** ( चचि. १९.९ ) गेरूसारखा वर्ण, लाल रंग.

**-वर्त्मता**-स्त्री., **लक्षण० रूक्षवर्त्मत्वम्** ( अहृसू. २३.६ ) रूक्ष पापण्या असणे.

**-वासिक**-पु., **कीट०** ( सुक. ३.५ )
एक विषारी किडा.

**-वृक्ष**-पु., **कषायरसयुक्तो वृक्षः** ( चचि. ४.१०४ )
तुरट रसाचा वृक्ष. क्षीरीवृक्ष.

**कषायाभ**-वि., **कषायवत् आभा यस्य तत्** ( चचि. ४.१२ ) तांबडा रंग आहे असा, गुलाबी.

**कषायास्यता**-स्त्री., **लक्षण० मुखस्य कषायरसत्वम्** ( चनि. १.२१ ) **अशीतिवातविकारेष्वेकः** ( चसू. २०.११ )
एक लक्षण. तोंड तुरट असणे. ऐंशी वात विकारांपैकी एक.

**कषायिन्**-पु., **वनस्पति० लकुचः** ( रा. परि. ९.४४ )
एक वनस्पती, क्षुद्र पनस.
**सर्जकः** ( रा. ९.२०५ ) राळ.

**कष्टशब्द**-वि., **कठिनार्थशब्दम्, नातिप्रसिद्धार्थम्** ( चवि. ८.२० )
कठीण अर्थ असलेला शब्द. अगदी अतिशय प्रसिद्ध नसलेला शब्द.

**कसन**-न., **रोग० कासः** ( र. १६.६७ )
एक रोग, खोकला.

**कसना**-स्त्री लूता०, **दंशनात् पिच्छिलं शीतलं च रुधिरं स्रवेत्, कासश्वासौ च भवतः** ( सुक. ८.११४-११५ )
एक विषारी किडा. दंशातून थंड बुळबुळीत रक्त स्रवते. खोकला व दम होतात.

**कसेरू**-पु., **वनस्पति० मुस्ता** ( रा. ६.५८ )
एक गवत. कंद. लहान नागरमोथा.
**चिञ्चोटम्** ( सुचि. १७.६ ) एक भाजी.
**गुण्डकन्दः** ( रापरि. ८.६३ )
भाजी, कंद, तळ्यात होणारा.
**अस्थि० पृष्ठास्थि** ( रा., १८.६२ )
पाठीचा कणा, पाठीचे हाड.

**कसेरूक**-पु., **ईषन्नीलपीतमणिः** ( चक्र. ) ( चचि. १७.१२६ )
एक मणि. थोडा निळ्या छटेचा पिवळा मणी.
**वनस्पति० मुस्ता** ( सुचि. ३७.३० )
नागरमोथा.
**वनस्पति०, नागरमुस्तकम्** ( सुचि. २२.४० ) द्र० **'मुस्त'**
नागरमोथा.
**वनस्पति० मागधम्** ( अहृसू. ( ६.९२ )
एक वनस्पती.

**कस्तूरिका**-स्त्री., **सुगन्धिद्रव्य०** ( चचि. २८.१५२ )
**इयं कस्तूरिमृगनाभिजन्या** ( ध. ३.२८ )
**गुणाः-तिक्ता कटुश्चक्षुष्या कफवातघ्नी विषमुखशोषमुखरोगकिलासकफजदुर्गन्धनाशिनी च** ( ध. ३.२८ )
**प्रकारः-' कपिला पिङ्गला कृष्णेति कस्तूरी त्रिविधा '** ( ध.३.२८ )
**लक्षणम्-' स्वादे तिक्ता पिञ्जरा केतकीनां गन्धं धत्ते तोलने च लाघवमस्ति । याऽप्सु न्यस्ता नैव वैवर्ण्यमीयात् सा कस्तूरी राजभोग्या प्रशस्ता ॥'** ( रा. १२.५१ )
एक सुगंधी द्रव्य. कस्तूरी. ही कस्तूरी मृगाच्या बेंबीतून मिळते. **गुण**-कडू, तिखट, डोळ्याला हितकर, कफवातनाशक, विष, तोंडाला शोष पडणे, तोंडाचे रोग-कोड-कफज दुर्गंधनाशक प्रकार तीन-भुरकट, पिंगट व काळी. **लक्षण**-स्वाद कडू, तांबडट-काळसर. केवडीचा वास येतो. वजनाला हलकी, पाण्यात टाकली असता तिचा वर्ण बदलत नाही ती कस्तूरी राजाने उपयोग करावी अशी असते.

**-मृग**-पु., **कस्तूरीहरिणः** ( र. १.११-२१ )
ज्या हरणापासून कस्तूरी मिळते तो हरिण.

**कह्लार**-न., **रक्तपद्मम्, रक्तोत्पलम्** ( सुसू. ३९.८ )
रक्त कमळ.
**सौगन्धिकोत्पलम्** ( सुउ. ४७.५७ ) सुगंधी कमळ.
**कुमुदम्** ( ध. ४.१५४ रा. १०.२४६ ) श्वेत कमळ.

**कह्लार**-पु., **वनस्पति० सौगन्धिकः** ( अरु. अहृसू. ३.३५ )
**सन्ध्याविकाशि पद्मिनीपुष्पम्** ( हे. अहृसू. ३.३५ )
एक वनस्पती, सायंकाळी उमलणारे सुगंधी कमळ, रात्रविकाशी कमळ.

**काक**–पु,. धान्य०, शालिः ( ध ६.७१ )
एक धान्य - साळ, भात.
**प्रसहपक्षि० कृष्णवर्णोऽयम्** ( सुसू. ४६.७४ )
**वातप्रकृतिकोऽयम्** ( सुशा. ४.६७ ) **शोषे बृंहणार्थं प्रशस्तः** ( सुउ. ४१.३६ ) **प्रतुदवर्गीयपक्षी** ( रा. १७.३ ) **तन्मांसगुणाः–लघु चक्षुष्यं दीपनमायुष्यं बृंहणं बल्यं क्षतदोषक्षयापहं च** ( ध. ६.४६८ )
कावळा. हा वातप्रकृतीचा. क्षयावर पुष्टिकर. **गुण**–हलका, डोळ्याला हितकर. दीपक, आयुष्यवर्धक, बलकारक, उरःक्षत व क्षयनाशक.

**( काकी )**–स्त्री., **वनस्पति० काकोली** ( रा. ३.१६६ )
एक वनस्पति, कावळी. अष्टवर्गापैकी एक.

**–घ्नी**–स्त्री., **महाकरञ्जः** ( ध. ५.११० )
मोठा करंज, गजगा, सागरगोटा.

**–चण्डीश्वर**–पु., **तन्त्रकर्तृविशेषः** ( र १.६ )
एक ग्रंथकर्ता.

**–जङ्घा**–स्त्री., **वनस्पति० अस्याः क्षारः श्लीपदनाशनः** ( सुचि. १९.६३ ) **काकाङ्गी** ( र. ११.५२ ) **काकजङ्घागुणाः–तिक्तोष्णा वर्ण्या कफघ्नी ज्वर-रक्तपित्तकृमिविषव्रणबाधिर्याजीर्णजीर्णविषमज्वरघ्नी-च** ( ध. ४.२३ )
हिं.–मसी, चकशोनी.
म.–**कांग.**
गु.–अघेडी.
बं.–कांगुडकाडली.
कांग, याचा क्षार हत्तीपाय या रोगावर उपयुक्त. उपयोग–कडू, उष्ण, वर्ण चांगला करणारी, कफनाशक. ज्वर, व रक्तपित्त, कृमि, विष, व्रण, बहिरटपणा, अजीर्ण, जुनाट पाळीचा तापनाशक.

**–जम्बू**–स्त्री., **जम्बूभेदः**, ( रा.११.१३२ ) **लघुजम्बूः, भूमिजम्बूः** ( र १७.४६ ) **द्र० ' जम्बू '**
जांभूळ प्रकार, लहान जांभूळ. पहा ' जम्बू '.

**–तिक्ता**–स्त्री., **वनस्पति० शार्ङ्गेष्टा** ( अरु ) **करञ्जिका** ( हे अहसू. १५.१७ ) सागरगोटा, गजगा.

**–तिन्दु**–पु., **वनस्पति० तिन्दुकभेदः** ( ध ५.४१ ) **द्र० ' तिन्दुक '.**
एक वनस्पती, टेंभूर, टेंभुरणी, कुचला. पहा 'तिन्दुक'.

**–तिन्दुक**–पु., **वनस्पति० फलगुणाः–कषायमम्लं गुरुवातविकारकृत्, पक्वं तु मधुरं किञ्चित्कफकृत्, पित्तघ्नं कान्तिहृच्च** (ध. ५.४१., रा. ११.५२–५३)
हिं.–तुमल.
बं.–मकागाव.
टेंभुरणी, टेंभूर. एक वनस्पती. फळाचे गुण–**कच्चे** तुरट, आंबट, जड, वातकर. **पिकलेले**–गोड, किंचित कफकर, पित्तनाशक, कांतिनाशक.

**–तुण्ड**–पु., **जलचरपक्षि० श्वेतकारण्डवः** ( असंसू. ७ )
पाण्यात वावरणारा एक पक्षी, पांढरा कारंडव.

**–तुण्डक**–पु., **काकतुण्डः** ( चसू. २७.४२ )
पहा ' काकतुंड '.

**–तुण्डफला**–स्त्री., **वनस्पति० काकनासा** ( ध. ४.२५ )
पांढरी कावळी, लाल तेड.

**( –तुण्डा )**–स्त्री., **वनस्पति० काकनासा** ( रा. ३.४० ) पांढरी कावळी, लाल तेड, कांगा.

**( –तुण्डी )**–स्त्री., **वनस्पति० काकादनी** ( रा. ३.४४ ) एक उपविष. वनस्पतिविष.
**खनिज० पित्तलभेदः** ( ध. ६.१८ )
पितळाचा एक प्रकार.

**–दन्तिका**–स्त्री., **वनस्पति० काकादनी** ( रा. ३.४४ ) कांगा, उपविष, वनस्पतिविष.

**–नन्दिका**–स्त्री., **वनस्पति० गुञ्जा** ( इंदु. असंनि. ७.१९ ) गुंज.

**–नासा**–स्त्री., **वनस्पति० वायसीफलं, वासाफलं** ( चक्र ) ( चसि. ४.९ ) **अस्याश्च फलभक्षणान्मत्स्या काकाश्च म्रियन्ते** ( र. ५.२४६ ) **वायफला** ( ड. सुचि. ३७.२० ) **काकनासागुणाः–तिक्ता, कटुः, कषाया,** ( भाप्र ) **मधुरा, उष्णा, शिशिरा** ( रा ) **व्रणशोधनी, रसायनी, दार्ढ्यकरी, वामनी, पित्तघ्नी, कफघ्नी, पलितनाशनी, शोफार्शःश्वित्रकुष्ठनुच्च** ( भाप्र. ) ( ध. ४.२५ )
ही फळे खाल्ल्याने कावळे व मासे मरतात. **गुण**–कडू, तिखट, तुरट, गोड, उष्ण, व्रणाचे शोधन करणारी, रसायन, दृढताकर, वांतिकर, पित्तनाशक, कफनाशक, पिकलेले केस काळे करते. सूज, मूळव्याध, कोड, व कुष्ठनाशक. पांढरी कावळी, लाल तेड, कांगा.

**–नासिका**–स्त्री.. **वनस्पति० नासाफला, काकतुण्डकः** ( चचि. २.६४ ) **द्र०** पहा ' काकनासा '

**–नीला**–स्त्री., **वनस्पति० जम्बूभेदः** ( रा ११.१३२ )
जांभूळ प्रकार.

**–पद**–न., **काकपदाकारो व्रणः** ( चचि. २३.६६ )
कावळ्याच्या पायाच्या आकाराचा व्रण, कोनाच्या आकाराचा व्रण.

**–पाद्**–पु., विकङ्कतः ( ध. ५.४३ ) बेहळी, बेहेकळ.
**( –पादा )**–स्त्री., द्र० **काकजङ्घा** ( ध. ४.२३ )
पहा ' काकजंघा '.
**–पीलु**–पु., वनस्पति० **काकतिन्दुः तिन्दुकभेदः** ( रा. ११.५२ )
टेंभुराचा प्रकार, एक वनस्पती.
द्र० **काकादनी**, ( ध ४.२७ ) पहा ' काकादनी '
**–प्राणा**–स्त्री., वनस्पति० द्र० **काकनासा** ( रा ३.४१ )
पहा ' काकनासी '
**–फल**–पु., वनस्पति० **निम्बः** ( रा ९.४३ )
कडुनिंब.
**( –फला )**–स्त्री., वनस्पति० **जम्बूभेदः**
( रा. ११,१३२ ) जांभुळीचा प्रकार.
**–बीजक**–पु., **तिन्दुकभेदः काकतिन्दुः** ( रा. ११.४२ )
टेंभुरणी.
**–भाण्डिका**–स्त्री., वनस्पति० **महाकरञ्जः**
( ध. ५.११० ) गजगा, सागरगोटा.
**–मद्गु**–पु., जलचरपक्षि० **अस्य वसा अहिततमा**
( चसू. २५.३९ ) पाणकोंबडा. याची वसा अतिशय अहितकर आहे.
**–माची**–स्त्री., **अस्याः पर्णानि कुष्ठादिषूद्वर्तनार्थमुपयुज्यन्ते** ( चसू. ३.१७ ) **इयं नात्युष्णशीतवीर्या भेदिनी त्रिदोषघ्नी च** ( चसू. २७.८९ )
**उष्णवीर्यत्वादियं पित्तवर्धिनी** ( सुसू. ४०.५ )
**पत्रशाक०** ( सुसू. ४६.२६६ ) **गुडेन संयोगादहिता** ( सुसू. २०.११ ) ( र. ११.५५ ) **गुडफला** ( अरु. ) अहृसू. १५.३० ) **कामाता**
( हे ) अहृसू. ६.७४ ) **काकमाचीगुणाः–तिक्ता कटुः, सोष्णा, स्वर्या, वृष्या, रसायनी, त्रिदोषघ्नी, कुष्ठशूलार्शःशोफकण्डूतिनाशिनी च** ( ध ४.२१ )
हिं.–मकोय, कवैया.
म.–लघुकावळी, कांगोणी.
गु.–कांगोणी, पीलुडीनी जात.
बं.–गुडकाई.
त.–मणत्तक्कालि.
कुष्ठ इत्यादी रोगांवर पाने उटणे म्हणून उपयोगी. अति उष्ण किंवा शीत नाहीत. मळाच्या गाठी फोडणारी त्रिदोषनाशक आहे. सुश्रुतमताने ही उष्णवीर्य म्हणून पित्तवर्धक आहे. गुळाबरोबर पानाची भाजी अहितकर. हिला अरुणदत्त गुडफला तर हेमाद्रि कामाला म्हणतात. गुण–कडू, तिखट, थोडी उष्ण, स्वराला व शुक्राला हितकर. रसायनी, त्रिदोषनाशक, कुष्ठ, शूळ, मूळव्याध, सूज व कंडूनाशक.
**–मात**–स्त्री., वनस्पति० द्र० **काकमाची** ( रा ४.३६ )
पहा ' काकमाची '
**–मुख**–न., यंत्र० **काकमुखसदृशं स्वस्तिकयन्त्रम्** ( सुसू. ७.१० )
एक यंत्र. कावळ्याच्या तोंडासारखे तोंड असलेले.
**–मुद्गा**–स्त्री., वनस्पति० **मुद्गपर्णी** ( रा. ३.१७५ )
रानमूग.
**–वन्ध्या**–स्त्री., वन्ध्या०, **सकृत्प्रसूः स्त्री** ( र. २२.४ )
एकदाच प्रसूत झालेली स्त्री.
**–वल्लभा**–स्त्री., वनस्पति० **जम्बूभेदः**
( रा. ११.१३२ ) जांभुळाचा प्रकार.
**–शिम्बी**–स्त्री., वनस्पति० द्र० **काकादनी** ( रा. ३.४३ ) पहा ' काकादनी. '
**–शोणित**–न., **काकस्य रक्तम्**
( असंउ. १२.२२२ ) कावळ्याचे रक्त.
**–साह्वया**–स्त्री., वनस्पति० **काकादनीभेदः**
( ध. ४.२९ ) एक उपविष. काकमाची प्रकार.
**–स्फूर्ज**–पु., वनस्पति० **तिन्दुकभेदः** ( रा. ११.५२ )
एक वनस्पति, कुचला, टेंभुर, टेंभुरणी.

**काकण**–न., रोग० **सप्तकुष्ठभेदेष्वेकं त्रिदोषजमिदम्** ( चचि. ७.२७ )
**काकणन्तिकावर्णान्यादौ, पश्चात्तु सर्वकुष्ठलिंगसमन्वितानि पापीयसा सर्वकुष्ठलिङ्गसंभवेनानेकवर्णानि काकणानीति विद्यात्** ( चनि. ५.८ )
कुष्ठाचा एक त्रिदोषात्मक प्रकार. प्रथम गुंजेसारखा तांबडा रंग व मध्ये काळा डाग असे दिसते, नंतर सर्व कुष्ठांची चिन्हे होतात.

**काकणक**–न., द्र० **काकणम्** ( चचि. ७.१३ )
एक कुष्ठ, पहा ' काकण '.

**काकणन्तिका**–स्त्री., **गुञ्जा** ( चचि .७.२० ) गुंज.
**चिरिहिण्टिका, काकादनी** ( सुनि. २.१३ )
एक टेंभुरणी.
**काकादनी** ( ध. ४.२७ ) पहा ' काकादनी '.
**–फल**–न., **गुञ्जाफलम्** ( सुनि. २.१३ )
गुंजेचे फळ, शेंग.

**काकणन्ती**–स्त्री., वनस्पति० **गुञ्जा** ( सुउ. ४०.१४ )
गुंज.

**–काकादनी** ( ध. ४.२७ )
पहा 'काकादनी'. एक टेंभुरणी.

**काकल**–न., **शारीर० तालुमूलम्** ( चसु. १८.२० )
टाळूचा मूळ भाग.
**शरीर० कण्ठमध्यम्** ( इन्दु ) ( असंशा. ५.८९ )
कण्ठाचा मध्यभाग.
**काकलीद्राक्षा**–स्त्री., **वनस्पति० द्राक्षाभेदः** ( रा. ११.७९ )

**काकलक**–पु., **धान्य० षष्टिकभेदः** ( सुसू. ४६.८ )
एक धान्य, साठे तांदुळाचा एक प्रकार. काळी साळ.
**शारीर० गलमणिः** ( सुशा. ५.२६ )
शरीर अवयव, गळ्याचा मणी.
**काकलम्** ( सुशा. ५.३७ )
गळमणी, गळ्याचा मणी.

**काकाक्षी**–स्त्री., **वनस्पति० काकनासा** ( रा ३.४१ )
एक वनस्पती, पहा 'काकनासा'.
**त्रिवृत्** ( ध. १.२४५ ) तेड.

**काकाण्ड**–पु., **वनस्पति०** ( चचि. २३.२१७ )
**तिन्दुकभेदः** ( रा. ११.५२ )
टेंभुरणीचा एक प्रकार.
**महानिम्बः** ( रा. ९.४६ ) मोठा निंब.
**शूकरशिम्बी.**
( चक्र. ) चसू. २७.३४; सुसू. ४६.३६ ( ड )
एक प्रकारची शेंग.
**–फल**–न., **वनस्पति०, अश्वकः, कपिकच्छुसदृशशिम्बः** ( सुसू. ४६–३६ )
खाजकुहिलीच्या शेंगेसारखी एक शेंग.

**( काकाण्डा )**–स्त्री., **शिम्बीभेदः, विषमूर्च्छायामञ्जने नस्ये चोपयुक्ता** ( चचि. २३.४९ )
एक शेंग, विषाने मूर्च्छा आली तर डोळ्यात अंजन आणि नाकात नस्य घालण्यास उपयुक्त.
**( काकाण्डी )**–स्त्री., **वनस्पति०, तेजोवती** ( रा. ३.३९३ )
जिच्या बियातून पिंवळे तेल निघते ती, ते तेल बुद्धिवर्धक असते.
**दधिपुष्पी** ( ध. १.१५३ ) पांढऱ्या फुलाची.
**लूता० काकाण्डिका, सा उपपादिका उच्यते** ( असंउ. ४४ ) इंदुपाठः पृ. ३६२ )
एक विषारी किडा. काकांडिका व उपपादिका ही म्हणतात.

**काकाण्डकी**–स्त्री.,–**काकमाची.**
( असंउ. ४४; ( इंदु पृ. ३६६ ) पहा 'काकमाची'

**काकाण्डिका**–स्त्री., **लूता० तद्दंशलक्षणम्–दंशः पाण्डुरक्तोऽतिवेदनो भवति । तृण्मूर्च्छाश्वासहृद्रोगहिक्काकासाः उच्छ्रिता भवन्ति ।** ( सुक. ८.१२६ )
**स्मृतिमोषाक्षेपकौ चेति ।** ( असंउ. ४५ )
एक किडा. दंशाची लक्षणे. दंश पांढरट तांबडा, अतिशय वेदना, तहान, मूर्च्छा, श्वास, उचकी, खोकला, हृदयाचे विकार, स्मृतिनाश, आक्षेपक व दाह.

**काकाण्डोला**–स्त्री., **वनस्पति० कोलशिंबी** ( चसू. २७.३४ )
एक वनस्पती, विष्णुक्रांता, मालकांगोणी.
**कटभी, ( अरु. ) निःशूका कपिकच्छुः** ( हे अहसू. ६.२२ )
खाजरी लव नसलेली कुहिली.

**काकाण्डोलाफल**–न., **काकाण्डोलाफलम् ( स्निग्धोष्णं मधुरं, गुरु, बल्यं, वृष्यं, वातहरं, बहुमलं, पुंस्त्वप्रदं च )** ( चसू. २७.३४ )
कुहिली. स्निग्ध, उष्ण, गोड, जड, बलवर्धक, शुक्रवर्धक वातहर, पुष्कळ मळ वाढविणारी व पुरुषत्व देणारी.

**काकादनी**–स्त्री., **वनस्पति० काकतिन्दुकः** ( ड. सुउ. ४४.१९ ) एक टेंभुरणी.
**कृष्णश्रीफलिका** ( ड. सुक. ७.३१ ) एक वनस्पती.
**वायसतिन्दुका** ( ड. सुचि. १४.८ ) एक टेंभुरणी.
**काकहिंस्रा** ( ड. सुचि. १९.६३ ) एक वनस्पती.
**गुञ्जा०, काकणन्तिका** ( ध. ४.२७ ) गुंज.
**अर्कफलसमानाकारगर्भितफला वल्ली, काकपीलुः काकवल्लरी** ( र. २९.१२१ ) कावळी.
**काकादनीगुणाः–तिक्ता, कटुः, उष्णा, केश्या, वृष्या, रुच्या, दिव्यरसायनी, वातकफघ्नी, ग्रहदोषोर्ध्वगदपलितघ्नी च** ( ध. ४.२७ )
कडू तिखट उष्ण केसाला हितकर, शुक्र वाढविणारी, रुचि वाढविणारी, सर्व धातूंची वाढ करणारी, वातकफनाशक ग्रहबाधा, डोक्याचे विकार नाशक.
हिं.–रती.
म.–गुंज.
बं.–कुंच.

**काकाम्र**–पु., **वनस्पति० नद्याम्रः** ( रा. परि. ४.१ )
एक वनस्पती.

**काकाह्वयोदुम्बरिका**–स्त्री., **वनस्पति० काष्ठोदुम्बरिका** ( ड. सुक. ४७.३७ ) काळा उंबर, खर्वती.

**काकाह्वा**–स्त्री., **काष्ठोदुम्बरिका** ( चक्र. चचि. २१.९० )

काळा उंबर, खर्वती, लाकडी उंबर.

**काकजङ्घा** ( रा. ४.३८ ) पहा 'काकजङ्घा'

**काकमाची** ( ध. ४.२१ ) पहा 'काकमाची'

**काकाह्वानोदुम्बरी**–स्त्री., **वनस्पति० काकसंज्ञोदुम्बरिका**
काळा उंबर. खर्वती ( सुचि. ९.२५ )

**काकिनी**–स्त्री., **मान० रक्तिका** ( र. १४.७२ )
एक तोळा. गुंज.

**पार्थिवद्रव्य० कपर्दिका** ( र. १०.४ ) कवडी.

**या नारी कृष्णपक्षे पुष्पवती भवति सा काकिनी-त्युच्यते सा रसबन्धे प्रयोगे रसायने चोत्तमा मता** ( र. ६.३३ )

जी स्त्री कृष्णपक्षात विटाळशी बसते ती. ही रस बंधनाच्या प्रयोगात व रसायन प्रयोगाला योग्य असे मानले जाते.

**काकुभ**–वि., **ककुभस्य नाम अर्जुनवृक्षस्य इदम्** ( चचि. २९.१४३ )
अर्जुनसादडा, या झाडाचे–मूळ फूल फळ इत्यादी.

**काकुलीमृग**–पु., **भूमिशयसर्प० श्वेतः श्यामः चित्रपृष्ठः कालक इति तस्य चत्वारो भेदाः ।** ( असंसू. ७.७६ ) ( चसू. २७.३७ )
जमिनीवर सरपटणारा साप–पांढरा, काळसर, निरनिराळ्या रंगाचे ठिपके असलेला व काळा असे ४ प्रकार.

**काकेक्षु**–पु., **तृण०–कशः** ( ध. ४.१३० )
कसाड, ल्व्हाळा.

**काकेन्दुक**–पु., **वनस्पति० तिन्दुकभेदः काकतिन्दुकः** ( ध. ५.४१ ) एक टेंभुरणी.

**काकोच्छ्वास**–पु., **अरिष्टलक्षण० काकवद् व्यात्ताननः श्वसिति ।** ( सुसू. ३१.१४ )
एक मरणदर्शक चिह्न. कावळ्याप्रमाणे तोंड उघडून श्वास चालू असलेला.

**काकोदुम्बरिका**–स्त्री., **वन० काष्ठोदुम्बरिका उपकुशाख्ये दन्तरोगेऽस्याः पत्राणि रक्तविस्रावणार्थमुपयुज्यन्ते ।** ( सुचि. २२.१९ )

**वनस्पति० फल्गुः** ( र. ११.११६ ) **जघने फला** ( र. २०.६३ )

काळा उंबर, खर्वती, लकड्या उंबर, हिरड्या सुजणाऱ्या दांताच्या रोगात याच्या पानाने रक्तस्राव करण्याला उपयोग करितात.

**काकोदुम्बरिकागुणाः–स्वादुः, कटुः, अम्ला, शीता, ग्राहिणी, कफपित्तघ्नी, कण्डूकुष्ठव्रणरक्त-पित्तशोफपाण्डुघ्नी च** ( ध. ५.८८ )
हिं.–कठूमर, कठगूलरी.
म.–काळा उंबर.
गु.–काळो उंबरो.
बं.–यज्ञडुमर, काकडुमर.
त.–पेयति, काट्टत्ति.

**गुण**–गोड, तिखट, आंबट, थंड, मळ घट्ट करणारा, कफपित्तनाशक, खाज, कुष्ठ, व्रणस्राव, सूज व पांडुनाशक.

**काकोली**–स्त्री., **वनस्पति० जीवनीयगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.९ )

**शुक्रजननमेकं द्रव्यम् ।** ( चसू. ४.१२ ) **अङ्गमर्द-प्रशमनगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१७ )
**बृंहणीयगणोक्तमेकं द्रव्यम् ।** ( चसू. ४.९ )
**स्नेहोपगमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१३ ) **काकोलीगुणाः स्वादुः शीता मधुरविपाका श्लेष्मशुक्रवर्धिनी वात-पित्तप्रशमनी ज्वरदाहक्षयरक्तविकारघ्नी च** ( ध. १.१३२ )

एक वनस्पती. जीवनीय, शुक्रजनन, अंगमर्दप्रशमन, बृंहण व स्नेहोपगगणात हे द्रव्य आहे. **गुण**–गोड, थंड, पचनानंतर मधुर, कफ, शुक्र वाढविणारे, वातपित्तशामक, ताप, दाह, क्षय व रक्तविकार नाशक.

**वनस्पति० दधिपुष्पी** ( ध. १.१५३ )
दह्यासारखे फूल असलेली वनस्पती.

**–द्वय**–न., **काकोली क्षीरकाकोली** ( असंसू. १५.२६ )
काकोली आणि क्षीरकाकोली. अष्टवर्गापैकी एक.

**काकोल्यादिगण**–पु., **वर्ग० काकोलीक्षीरकाकोली जीवकर्षभकमुद्गपर्णी-माषपर्णी-मेदामहामेदाच्छिन्न-रुहाकर्कटशृङ्गीतुगाक्षीरीपद्मकप्रपौण्डरीकर्धिवृद्धि-मृद्वीकाजीवन्त्यो मधुकं चेति । वर्गोऽयं जीवनो बृंहणो वृष्यः स्तन्यः श्लेष्मकरः पित्तशोणितानिलना-शनश्च ।** ( सुसू. ३८.३५–३६ )

**एक औषधिगण**–काकोली, दुधी काकोली, जीवक, ऋषभक, रानमूग, रानउडीद, मेदा, महामेदा, गुळवेल, काकडशिंगी, वंशलोचन, पद्मकाष्ठ, कमळ, ऋद्धि, वृद्धि, मनुका, जीवन्ती (हरिण दोडी) ज्येष्ठमध.
**गुण**–प्राणवर्धक, पौष्टिक, शुक्रधातूला हितकर, दूध वाढविणारा, कफकर, पित्तरक्तदोष व वात नाशक.

**काकौष्ठक**–पु., **पञ्चदशकर्णबन्धेष्वेकः** ( सुसू. १६.१० )
कानाच्या पंधरा बंधांपैकी एक.

**काखोर्द**–पु., अष्टादशभूताधिपतिष्वेकः ( असंउ. ७ इन्दु )
भूतांच्या अठरा अधिपती मधीलएक.

**काङ्कायन**–पु., ऋषि० रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेष्वेकः ( चसू. १.१२ ) यज्ञः पुरुषविषये विवदमानो मुनिः ( चसू. २५.२२ ) बाल्हीकभिषगिति तस्यापरं नाम ( चशा. ६.२१ )
हिमालयाजवळ चिकित्सेबद्दल विचार करण्याकरिता एकत्रआलेल्या ऋषींपैकी एक. बाल्हीक भिषक हे त्याचे दुसरे नाव.

**काङ्क्षा**–स्त्री., हृदि आहारेच्छा ( सुउ. ३९.१०४ )
अन्नाभिलाषः ( ड. सुनि. ७.७ )
मनात आहाराची इच्छा. अन्न खावे असे वाटणे.

**काङ्क्षी**–स्त्री., खनिज० सौराष्ट्री ( ध. ३.१०५ )
सौराष्ट्रिका ( चक्र ) ( चचि. २३.५४ )
स्फटिका ( र. २.१०५ )
तुरटी, सौराष्ट्री, सौराष्ट्रिका, स्फटिका हे तुरटीचेच पर्याय शब्द.

**काङ्गुक**–पु., व्रीहि० षष्टिकभेदः ( सुसू. ४६.८ )
साठे तांदुळाचा प्रकार.

**काच**–न., लवणभेदः काचलवणम् ( र. १९.२६ )
पु., पार्थिव० अनुशस्त्रेष्वेकम् ( सुसू. ८.१५ )
एक मीठ, एक उपशस्त्र.
स्फटिकः ( असंसू. १२.२१ )
काचेसारखा चमकणारा,–दिसणारा, पारदर्शक, अतिस्वच्छ पदार्थ.
नेत्ररोग० ( चचि. २३.७३ ) अस्य लिङ्गनाशतिमिरनीलिकाश्चेति पर्यायाः ( सुउ. ७.१८ ) दृष्टेः तृतीयपटलगतस्तिमिराख्यो रोगः । अत्र दोषेण दृष्टेः रागप्राप्तिर्भवति ( सुउ. ७.१८ ) रागप्राप्तस्य तिमिरस्य काच इति संज्ञा ( सुउ. ७.१५ )
काचसंप्राप्तिलक्षणे–तिमिराख्योऽयं नेत्ररोगो दोषे तृतीयपटलाश्रिते सति काचतां प्राप्नोति । तेन ऊर्ध्वमीक्षते नाधः । दृष्टिस्तनुचैलावृतोपमं यथावर्णं च रज्यते क्रमाद् हीयते च ( ड. सुउ. ७.१५ )
काचस्य दोषानुरोधेन लक्षणानि–वातेन आविलान्यरुणाभानि व्याविद्धानि भ्रमन्तीव च रूपाणि काचपीडितः पश्यति । पित्तेन आदित्यखद्योतशक्रचापतडिद्गुणान् शिखिबर्हविचित्राणि नीलकृष्णानि पश्यति । कफेन स्निग्धानि सितानि गौरचामरगौराणि श्वेताभ्रप्रतिमानि च रूपाणि पश्यति । अत्यर्थमसूक्ष्माणि रूपाणि पश्यति । व्यभ्रेऽभ्रसम्प्लवं तथा सलिलप्लावितानीव परिजाड्यानि रूपाणि पश्यति । रक्तेन धूमधूम्राणि तमांसि विविधानि रूपाणि पश्यति । सन्निपातेन चित्राणि विप्लुतानि रूपाणि च पश्यति । समन्ततः सर्वाण्येव बहुधा द्विधा वा तथा हीनाधिकाङ्गानि ज्योतींष्यपि च पश्यति ( सुउ. ७.१८–२४ )
नेत्ररोगोऽयं स्नेहादिक्रियया याप्यः ( डसुउ. ८.४५ )
एक नेत्र रोग, काचबिंदु, लिंगनाश, तिमिर, नीलिका हे पर्याय शब्द. डोळ्याच्या पटलांपैकी तिसऱ्या पटलाच्या दुष्टीने हा रोग होतो. दृष्टि लाल होते दृष्टीला असा रंग आला की काच म्हणतात. नाहींतर तिमिर म्हणतात. तिमिर म्हणजे अंधुक–अंधार दिसणे. पदार्थ बारीक–झिरझिरीत कपड्याने झांकलेला व रंगीत दिसतो. क्रमाने हे दिसणेही कमी होत जाते. रोगी वर पहातो, खाली पहात नाही. दोषलक्षणे–**वात**–गढूळ, लालसर, फुटलेली व हालणारी अशी वस्तु दिसते. **पित्त**–सूर्य, काजवा, इंद्रधनुष्य, वीज, कोंबडा व मोर यांचे निळा काळा पिवळा लाल असे रंग दिसतात. **कफ**–स्निग्ध, पांढरट, पांढऱ्या चवरीसारखे पांढरे, पांढऱ्या अभ्रासारखे रूप दिसते. अतिशय स्थूल पदार्थ दिसतात, आकाश निरभ्र असताना अभ्राच्छादित दिसते, पदार्थ ओले व ओथंबलेले पहातो. **रक्त**–तांबडे, धुरकट, अंधुक व नानाप्रकारची रूपे दिसतात. **सन्निपात**–चित्र विचित्र, सारवलेली भोवताली सर्व दुहेरी तिहेरी काही अवयव अधिक तर काही कमी झालेले असे तारे, ज्योती पहातो. उपचार–जोपर्यंत तेल तुपासारख्या यथायोग्य स्नेहाचा उपयोग केला जातो तो पर्यंत ठीक.

**–घटी**–स्त्री., काचपात्रम् ( र. २७.४६ )
काचेचे भांडे.

**–तिलक**–न., काचलवणम् ( रा. ६.४४ ) एक मीठ.

**–पात्र**–न., काचमयं पात्रम् ( सुसू. ४६.४५३ )
काचेचे भांडे.

**–मणि**–पु., काचः, योनिधूपनद्रव्येष्वेकम्
( चशा. ८.४१ ) योनीला धूर देण्याचे एक द्रव्य.

**–मल**–न., काचलवणम् ( रा. ६.४५ ) बांगडखार.

**–लवण**–न., पार्थिव० तत् वर्णतः कृष्णम् । तद्गुणाः ईषत्क्षारं रुच्यं दीपनं दाहकं पित्तलं कफवातघ्नं गुल्मशूलहरं च ( र. १९.२६–२९ )
बांगडखार–हे रंगाने काळे असते. गुण–थोडा क्षार

असलेले, रुचकर, अग्नि प्रदीप्त करणारे, दाहकारक, पित्तवर्धक, कफ व वातनाशक गुल्म व शूल हरण करणारे.

**-संभव**-न., **काचलवणम्** ( रा. ६.४४ )
बांगडखार.

**-सौवर्चल**-न., **काचलवणम्** ( रा. ६.४४ )
बांगडखार.

**काचाक्ष**-पु., जलचरपक्षी० **कपर्दिपाकः** ( सुसू. ४६.१०५ )
पाण्यात वावरणारा एक बगळा पक्षी.

**काचोत्थ**-न., **काचलवणम्** ( रा. ६.४५ )
बांगडखार.

**कांजल**-वि., **अल्पं जलं यस्मिन् तत्** ( असंसू. ९.८२ )
थोडे पाणी ज्यात आहे असे. ( तळे )

**काञ्चन**-पु., वनस्पति० **चम्पकः** ( ध. ५.१४२ )
सोनचाफा.
**धत्तूरः** ( र. १८.३९ ) धोत्रा.
**शालिभेदः** ( अहृसू. ६.२ ) तांदुळाचा प्रकार.
सोनसाळ. न., **नागकेसरम्** ( रा. ६.७३ )
नागकेशर.
**खनिज० सुवर्णम्** ( सुसू. २९.७२; ध. ६.१ )
खाणीतले सोने.

**( काञ्चनी )**-स्त्री., **वनस्पति० हरिद्रा, स्वर्णक्षीरी** ( र. १८.१०४ ) **काञ्चनारः** ( र. १५.८ ) **गोरोचना,** ( रा. १२.३४ ) **काञ्चनक्षीरी** ( ध. १.२४२ )
हळद, काटेधोत्रा, कांचन. गोरोचन. सुवर्णक्षीरी. ( पिसोळा )

**-कदली**-स्त्री., **वनस्पति० सुवर्णकदली** ( रा. ११.११५ ) सोनकेळ.

**-क्षीरी**-स्त्री., **सुवर्णक्षीरी** ( सुचि. ३०.१६ )
काटे धोत्रा, पिसोळा.
**तद्गुणाः-तिक्ता, शोधनी, पित्तघ्नी, दोषसंघातशमनी, कृमिविषरक्तपित्तघ्नी च** ( ध. १.४१ )
**कटुः, शमनी, रेचनी, कफघ्नी, शोफपित्तज्वरघ्नी च** ( रा. ५.३६४ )
कडु, दोष बाहेर काढणारा, पित्तनाशक, दोषांचा समूहशामक, कृमि, विष, रक्तस्राव नाशक, तिखट, शामक, रेचक, कफघ्न, सूज, पित्तज्वर नाशक.

**-गैरिक**-न., **खनिज० दाक्षिणात्यप्रसिद्धं काञ्चनवर्णं गैरिकं छर्दिशमनम्** ( चक्र. ) चचि. २०.३२ )
सोनकाव, सोनागेरू. दक्षिणेत प्रसिद्ध असलेला सोन्याच्या रंगाचा गेरू. ओकारीनाशक.
**सुवर्णगैरिकम्, चूर्णमस्य पाण्डुशमनार्थं उपयुज्यते** ( सुउ. ४४.२१ )
सोनकाव, पांडुरोगशमन होण्याकरिता. याचे चूर्ण देतात.

**-पुष्पक**-न., **वनस्पति० आहुल्यम्** ( रा. ४.३४ )
एक वनस्पती, काश्मीरमध्ये, तरवट, तरवड, आवेर.

**-पुष्पी**-स्त्री., **वनस्पति० गणिकारी** ( रा. १०.३१ )
नरवेल.

**-रस**-पु., **खनिज० माक्षिकः** ( र. २.७९ )
खाणीतला,. सुवर्णमाक्षिक.

**काञ्चनक**-पु., **स्वर्णशालिः** ( सुसू. ४६.४ )
**पद्मकेसरम्** ( ध. ४.११६ )
**धत्तूरकः** ( ड. सुसू. ३९.७ )
सोनसाळ, कमळकेशर, धोत्रा.
न., **खनिज० हरितालम्** ( रा. १३.५९ ) हरताळ
**वनस्पति० पद्मकेसरम्** ( ध. ४.१६५ )
कमळाचे केशर.

**( काञ्चनिका )**-स्त्री., **वनस्पति० गणकारी** ( रापरि. १०.३१ ) नरवेल.

**काञ्चनार**-पु., **वन० कोविदारः** ( ध. १.१.१९६; रा. १०.२९४ ) कांचन.

**काञ्चनारक**-पु.. **काञ्चनारः** ( ध. १.१९६ ) कांचन.

**काञ्जि**-स्त्री., **काञ्जिकम्** ( र. ३०.९२ ) कांजी.

**काञ्जिक**-न., **आसुत०** ( ध. ६.२४९ ) **नाडीस्वेदोपयोगि द्रव्यम्** ( चसू. १४.३३ ) **नष्टार्तवोपचारेष्वेकं द्रव्यम्** ( सुशा. २.२२ ) **पक्वधान्यकृतं संधानम्, पारदस्वेदनोपयोगि ।** ( र. ११.२६ ) **अस्य आरनालमित्यपरं नाम । तन्निर्माणविधिः-निस्तुषीकृतैरामैः पक्वैर्वा गोधूमैः संधितैरारनालं स्यात् । गुणैस्तत् सौवीरसदृशम् ।** ( भाप्र. ) **नूतनमृन्मयकुम्भं कटुतैलेन लेपयेत् । निर्मलं जलं तस्मिन् क्षिपेत् । राजिकाजाजिसैन्धवं हिंगुविश्वानिशाः ओदनं वंशपल्लवान् ओदनकुलित्थयोः जलं, वटकखाण्डवं च तस्मिन्निधाय, मुद्रां दत्वा, दिनत्रयं स्थापयित्वा, ततो वस्त्रे गालितं काञ्जिकं भवेत् ।** ( शानि. )
**काञ्जिकगुणाः-अम्लं रूक्षमुष्णं** ( असंसू. १७.२२ )
**अवस्रंसनं दीपनं स्पर्शाद्दाहज्वरापहं सेवनाद्वातकफघ्नं विबन्धशोफमूर्च्छाशूलश्रमाध्माननाशनं च** ( ध. ६.२४९ )

आंबवलेले धान्य जल, कांजी, पान्याच्या स्वेदनास उपयोगी. निर्मिती–तूस ( साल ) काढलेले कच्चे किंवा शिजविलेले गहूं आंबवल्याने आरनाल होते. कांजीः– नवे मडके मोहरीच्या तेलाने माखून स्वच्छ पाणी घालून त्यात मोहरी, जिरे, सैंधव, हिंग, सुंठ, हळद, भात, बांबूची पाने, भात व कुळीथ यांचे कण वड्याचे तुकडे एकत्र घालून झाकण लावून लेपाने तोंड बंद करून ३ दिवस ठेवावे. नंतर वस्त्रातून गाळून घ्यावे, गुणः–आंबट, रूक्ष, उष्ण, मळ बाहेर काढणारी अग्निदीपक, वातकफनाशक, मळबद्धता, सूज, मूर्च्छा, शूल, श्रम, पोटफुगीनाशक व त्वचेला चोपडल्याने दाह ज्वरनाशक. नष्टार्तवात दिल्याने मासिकस्राव व्यवस्थित सुरू करणारी व नळीतून वाफेने शेकण्याच्या उपयोगी. पर्याय आरनाळ.

**( काञ्जिका)**–स्त्री., **जीवन्ती** ( रा. ३.१७८ ) हरणवेल पलाशी ( रापरि ३.५० )

**–प्रसाद्**–पु., **काञ्जिकस्योपरितनोऽच्छो भागः** ( सुसू. २२.८ )
कांजीच्या वरचा पातळ स्वच्छ द्रव. कांजीची निवळ.

**काठिन्य**–न., **असृदुत्वम्** ( अहृसू. १२.५३ )
कठिणपणा. कडकपणा.

**काढक**–न., **क्वाथः** ( काखि. १३.६७ ) काढा.

**काण**–पु., **नेत्ररोग०** ( चसि. २.२१; सूचि. २२.३० )
डोळ्याचा एक रोग. एक डोळा असलेला.

**काणा**–स्त्री. वनस्पति० **द्र० काकोली** ( उ., सुउ. ६०.४८; असंउ. ८; ( इंदुः ) पहा ‘काकोली’.

**–कपोत**–पु., पक्षि० **प्रतुदवर्गीयः** ( असंसू. ७.१०९ ) **अल्पारुतकपोतभेदः** ( हे. अहृसू. ६.६० ) **वनवासी पाण्डुकपोतः; अरुणवर्णकः कपोतः** ( उ. सुसू. ४६.६९ )

**काणकपोतगुणाः–कषायः स्वादुर्लवणो गुरुश्च ।** ( सुसू. ४६.६९ )

**सर्वदोषकृत्** ( अहृसू. ६.६० ) **काणकपोतः पक्षिणामहिततमः ।** ( चसू. २५.३७ )
भक्ष्य चोचीने टोचून खाणाऱ्या पक्ष्यांपैकी एक पक्षी. थोडे ओरडणारा कबूतर. प्रकार (१) फिकट लालसर (२) रानातला पांढरट. गुण–तुरट, गोड, खारट, जड, सर्व दोषकर. पक्ष्यांच्या मांसात सर्वात अहितकर असलेला पक्षी.

**–काण्ड**–न., **मृदुर्वृक्षखण्डः** ( र. १५.९३ )
झाडाचा मऊ तुकडा.
लाकडाचा तुकडा.

**काष्ठखण्डम्** ( र. १७.१२ ) पु. **पूर्वापरसंच्छिन्नोऽस्थ्यवयवः** ( सुनि. १५.४ )
हाडाचा दोन्ही बाजूने तुटलेला तुकडा असलेला अवयव.

**वनस्पति० किराततिक्तः** ( ध. १.३३ )
काडेचिराईत.

**वनस्पति०** ( ध. ४.१३५ ) बाणगवत.

**–कटुक**–पु., **वनस्पति० काण्डीरः** ( ध. ४.६२ )
कांडवेल.

**–काण्डक**–पु., **वनस्पति० काशः** ( रा. ८.२०१ )
कास गवत.

**–कीलक**–पु., **वनस्पति० लोध्रः** ( रा. ६.२३८ )
लोध्र.

**–गुण्ड**–पु., **वनस्पति० गुण्डः** ( रा. ८.६० )
गोंडाळ. गवती चहा.

**–चित्रा**–स्त्री., **वर्ति० सैन्धवादिभिर्निर्मिता सर्वाक्षिरोगान् जयति** ( असंउ. १९.२४९ )
वात, कांडी. सैंधव इत्यादींची केलेली. डोळे येणे इ० डोळ्याचे सर्व रोग बरे करते.

**सर्प० राजिलजातीयः** (असंउ. ४२. इंदु पृ. ३२३)
पट्टे वा रेषा असलेला सर्प.

**–पुङ्खा**–स्त्री., **वनस्पति० शरपुङ्खा** ( रा. ४.६ )
उन्हाळी.

**–भग्न**–न., **रोग० अस्थिकाण्डभङ्गः** ( सुनि. १५.४) **अस्थिभङ्गस्य प्रकारः**, ( सुनि. १५.१० ) **तस्य सामान्यलक्षणम्–श्वयथुबाहुल्यं स्पन्दनविवर्तन–स्पर्शासहिष्णुत्वम्, अवपीड्यमाने शब्दः, स्रस्तांगता, विविधवेदनाप्रादुर्भावः, सर्वास्ववस्थासु न शर्मलाभ इति** ( सुनि. १५.९ ) **काण्डभग्नं द्वादशविधम्–कर्कटकमश्वकर्णं चूर्णितं पिच्चितमस्थिच्छलितं काण्डभग्नमज्जानुगतमतिपातितं वक्रं छिन्नं पाटितं स्फुटितमिति** ( सुनि. १५.८ )
हाडाची नळी तुटणे, फुटणे. हाड मोडण्याचा एक प्रकार. सामान्य लक्षण–फार सूज, वाहिन्या उडणे, स्फुरण, हलणे, अथवा स्पर्श सहन न होणे. दाबल्याने शब्द, तो अवयव गळाल्यासारखा होणे. नाना प्रकारच्या वेदना, कोणत्याही अवस्थेत बरे वाटत नाही. काण्डभग्न बारा प्रकारचे–कर्कट, अश्वकर्ण इ.

**–रुहा**–स्त्री., **कटुका** ( ध. १३७ ) कुटकी.

-**लवण**–न., भैषज्य० वनस्पति० काण्डैः लवणे च साधितो योगः तत् प्रक्रिया–स्नुहीकाण्डवार्ताकु-शिग्रुलवणानि समांशानि संक्षुद्य, घटं पूरयित्वा सर्पिस्तैलवसामज्जभिः, प्रक्षिप्य शुष्कगोमयेन दाहयेत् । एतत् स्नेहलवणमुपदिशन्ति वातरोगेषु इति ( सुचि. ४.३१ )
एक औषधियोग. त्रिधारी निवडुंगाचे कांडे, वांगे, शेवगा आणि सैंधव समभाग एकत्र कुटून मडक्यात तूप तेल वसा मज्जा घालून भरावे, तोंड झाकून मातकापडाने सांधा बंद करून वाळलेल्या शेण्यात भाजून ( पुट देऊन ) काढावे, याला स्नेहलवण ही म्हणतात. वातरोगांवर उपयुक्त.

-**वल्ली**–स्त्री., वनस्पति० काण्डीरः ( र. २.३० )
काण्डवेल.

-**शाखा**–स्त्री., वनस्पति० सौम्या ( रापरि. ३.३१ )
पाने नसलेली किंवा अगदीं थोडी पाने असलेली वेल. म्हैसवेल.

-**संधि**–पु., वंशाङ्कुरः ( रा. ७.२१९ )
बांबूचे कोंब, वेळूचे कोंब.

-**हीन**–पु., लोध्रः ( ध. ३.१७५ ) लोध्र.

**काण्डेक्षु**–पु., वनस्पति० काशः ( ध. ४.१३० )
कासतृण, कसाडतृण.
इक्षुभेदः श्वेतेक्षुः ( रा. १४.१८१ ) पांढरा ऊस.
बृहदिक्षुः ( चक्र. ) चचि. १०.३३ )
मोठा जाडा ऊस.
श्वेतेक्षुः शुक्रशोधनगणोक्तमेकं द्रव्यम् । ( चसू. ४.१२ )
पांढरा ऊस, शुक्र धातूचे शोधन करणाऱ्या गणातील एक औषध.

**काण्डेक्षुका**–स्त्री., वनस्पति० तृणपञ्चमूलेष्वेकम् महती खगाली ( सुसू. ३८.७५ )
इक्षुः ( सुसू. ३८.७५ ड )
बोरू, वेळू, बांबू, तृणपंचमूळापैकी एक वनस्पती. ऊस.

**काण्डक**–पु., स्वल्पप्रमाणः खण्डः ( चचि. १३.८१ )
लहान तुकडा.
न., वालुकम् ( ध. १.१७८ ) वाळूक.

**( काण्डिका )**–स्त्री., धान्य० कराल ( ध. ६.१०९ )
लांक नावाचे धान्य.

**काण्डीर**–पु., वनस्पति० ( चक. १.२५ )
गाण्डीरः ( असंसू. १५.२० ) काण्डवेल.
काण्डीरगुणाः–कटुः तिक्तः तृष्णः सरः दुष्टव्रणलूता-गुल्मोदरप्लीहशूलमन्दाग्निनाशनश्च । ( ध. ४.६२ )
गुणः–तिखट, कडू, उष्ण, सारक, दुष्टव्रण विषारी-कृमीचे विष, गुल्म, उदर, प्लीहा, शूल, मंदाग्नि नाशक.

**कात्यायन**–पु., ऋषि० रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः । ( चसू. १.११ )
हिमालयाजवळ रोगनाशक उपायांच्या विचार-विनिमयाकरिता जमलेल्या ऋषींपैकी एक.

**काथरा**–स्त्री., वनस्पति० तद्गुणाः–तिक्ता, दीपनी, वातघ्नी च । ( रापरि. ५.३६ )
एक वनस्पती. गुणः–कडू, अग्निदीपक, वातघ्न.

**कादम्ब**–पु., वारिचरपक्षि० कलहंसः ( चसू. २७.४२ )
कलहंसोऽतिधूसरपक्षोऽसौ प्लववर्गीयः संघातचारी च ( सुसू. ४६.१०५ )
बदक, पाण्यात वावरणारा पक्षी, अति करड्या रंगाचा पक्षी.
न., स्थावरविष० पुष्पविषमेतत् ( सुक. २.५; )
एक विष. विषारी फूल.

**कादम्बरी**–स्त्री., आसुत० मद्यम् ( ध. ६.२५६ )
दारू. कळंबाच्या फुलाची दारू.
वनस्पति० कदम्ब ( ध. ५.१०४ ) कळंब.

**कादम्बर्य**–पु., वनस्पति० कदम्बभेदः ( ध. ५.१०५ )
एक कळंब, पहा 'कदंब.'

**कादि**–पु., वनस्पति० कारवेल्लम् ( र. १२.१०४ )
कारले.
कादिकगणः ( र. १४.१०–१३ )
ककाराने आरंभ असलेल्या नावाचा गण.

**कादिकगण**–पु., ककारारब्धद्रव्याणां गणः–कङ्गुः कन्दुकः ( पूगः ) कोलः ( मध्यमो बदरः ) कुक्कुटः कलः ( बदरः ) क्रोडः ( वराहः ) कुलत्थाः कण्टारी ( बृहती ) कटुतैलं ( राजिकातैलं ) कृष्णगलकः ( मधुरः ) कूर्मः कलायः कणा ( पिप्पली ) कर्कारुः कटिल्लकं कतकं कर्कोटकं कर्कटी काली काञ्जिकं च अयं श्रीकृष्णदेवोक्तः ( र. ११.१३१ )
क अक्षराने आरंभ होणाऱ्या नांवाच्या द्रव्याचा गण–कांग, सुपारी, बोर ( मध्यम ) कोंबडा, लहान बोर, डुक्कर, कुळीथ, रिंगणी, मोहरीचे तेल, मोर, कासव, वाटाणा, पिंपळी, कोहळा, कर्टोले, निवळी, बेल, काकडी, काळे तेड व कांजी.

**कानन**–न., वनम् ( सुसू. ६.२८ ) रान, वन.
उद्यानम् ( सुउ. ४७.५७ ) उद्यान, बगीचा, बाग.
**–दीर्घिका**–स्त्री. उद्यानदीर्घिका अवतरणवापी ( सुउ. ४७.५७ ) बागेतील विहीर.
**काननोपल**–न., आरण्योपलं, वन्यच्छगलमिति यावत् ( र. २१.२० ) रानशेणी.
**कान्त**–पु., वनस्पति० नन्दीवृक्षः ( रा. १२.३१ ) नांदुरकी, एक वनस्पती.
न., खनिज० लोहभेदः ( ध. ६.२८ ) खाणीतला धातु. लोहचुंबक. लोखंड.
कान्तलोहम् ( र. १.२२ ) लोहचुंबक.
वनस्पति० कुङ्कुमः ( रा. १२.२१ ) केशर.
वि., कमनीयम्, मनोहरम् ( सुचि. २४.६६ ) मनोहर, सुंदर, सुखद, इष्ट.
**( कान्ता )**–स्त्री., वनस्पति० रेणुका ( रा. ६.९९ ) रेणुकबीज.
बृहती ( ध. १.९३ ) डोरली.
त्रिसंधिः ( रा. १०.३७ ) संध्याकाळी फुले येणारी त्वग्रोग व खोकला नाशक वनस्पती. पांढरी व काळी अशी २ प्रकारची.
वाराहीकन्दः ( ध. ४.९२ ) डुक्करकंद.
एलाभेदः, भद्रैला ( रा. ६.७१ ) मोठा वेलदोडा.
मञ्जिष्ठा ( चचि. २५.११६ ) मंजिष्ठ.
वनमल्लिका ( ध. ५.१४० ) रानमोगरी.
प्रियंगु ( र. २०.६ ) गव्हला, राळे.
**–नाग**–पु., अञ्जन० ( र. २८.९२ ) एक प्रकारचा सुरमा.
**–पुष्प**–पु., वनस्पति० कोविदारः ( रा. १०.२९३ ) कांचन.
**–मल**–पु., मण्डूरः ( र. २७.३७ ) मंडूर.
**–रस**–पु., सिद्धयोग० कान्तलोहभस्म तत्समश्च पारदो गन्धकः टङ्कणं चेति सर्वं त्रिदिनं मत्स्यपित्तेन मर्दयेत् आर्द्रकस्वरसेन च नवज्वरे दद्यात् ( र. १२.१४८ )

एक सिद्ध औषध–लोहचुंबक भस्म. पारा, गंधक, टांकणखार, हे सर्व समभाग तीन दिवस माशाच्या पित्तात घोटावे. आल्याच्या रसाबरोबर नवज्वरात द्यावे.

**–रसायन**–न., सिद्धयोग० अनेन समृद्धा देहसिद्धिः प्राप्यते तथा च वृष्यत्वं पुत्रप्राप्तिश्च साध्यते दीपनं च भवति ( र. २६.३७ )



एक सिद्धयोग. याने शरीरपुष्टि, बळ, शुक्रधातुबल पुत्रप्राप्ति व अग्निदीपन होते.

**–लोह**–न., खनिज० तस्य शोधनम्–कान्तलोहं तप्तं कृत्वा त्रिफलाक्वाथे सप्तवारं निर्वापयेत् । अनेन तत् शुद्धं भवति ( र. ५.१३७–१३९ )

तस्य मारणम्–शुद्धं कान्तं जम्बीरादिना अम्लेन पेषयित्वा, लोहापेक्षया चतुर्थांशेन पारदभस्मना तत् प्रलेपयेत् तत् पुटवह्नौ पचेत् । अथवा समभागैस्ताप्यगंधाश्महरतेजोभिः कान्तं लिप्त्वा गजपुटैः पचेत् । कान्तलोहं भ्रामकादिभेदात् चतुर्विधम्, भ्रामकं कनिष्ठम् चुम्बकं मध्यमम् कर्षकमुत्तमम् द्रावकमुत्तमोत्तमं च । ( र. ५.६४ ) व्याधिनाशे भ्रामकं चुम्बकं च प्रशस्तं वर्तते । रसकर्मणि रसायनकर्मणि च कर्षकं द्रावकं च हितम् । पक्वजम्बूफलच्छायं कान्तलोहमुत्तमं वर्तते । ( र. ५.१३६ )

मारुतातपविक्षिप्तं कान्तलोहं वर्ज्यम् ।
कान्तलोहगुणाः–कान्तायोऽतिरसायनोत्तरतरं स्वस्थे चिरायुःप्रदं स्निग्धं मेहहरं त्रिदोषशमनं शूलाममूलापहम् । गुल्मप्लीहयकृत्क्षयामयहरं पाण्डूदरव्याधिनुत् तिक्तोष्णं हिमवीर्यकं किमपरं योगेन सर्वार्तिनुत् । ( रर. ५.१०४ )

खाणीतला एक धातु. **शुद्धि**–लोहचुंबकाचा चुरा लाल तापवून त्रिफळेच्या काढ्यात सात वेळ विझवावा. **मारण**–त्याचे शुद्ध चूर्ण ईडनिंबु इत्यादी आंबट रसात खलून एक चतुर्थांश पारद भस्माने ते लपेटून पुट द्यावे. अथवा समभाग सुवर्णमाक्षिक गंधक व पारा यांचा लेप करून गजपुट द्यावे.

प्रकार–४ द्रावक सर्वात उत्तम, त्यापेक्षां कर्षक, चुंबक व भ्रामक क्रमाने कनिष्ठ, रोगनाशाकरिता भ्रामक व चुंबक चांगले, व रसायन आणि पारदकार्यांत कर्षक व द्रावक चांगले. पिकलेल्या जांभळासारखे रंगाने दिसणारे कांत लोह उत्तम. वारा व ऊन्ह यात पडून असलेले वर्ज्य. खाणीतून काढताच केलेले भस्म सर्वोत्तम. **गुणः**–उत्तम रसायन, दीर्घायु देणारे, स्निग्ध पण प्रमेहहर, त्रिदोषशमन, शूल, आम, मूळव्याध, गुल्म, प्लीहावृद्धि, यकृद्वृद्धि, क्षय, पांडु, व उदरनाशक. कडु, उष्ण, वीर्याने थंड सर्वरोगनाशक.

**-लौह**-न., कान्तलोहम् ( रा. ५.१३६ )
पहा ' कांत लोह '
**-संज्ञ**-न., खनिज० वैक्रान्तम् ( ध. ६.४४ )
तोरमल्ली.
**कान्तलक**-पु., वनस्पति० नन्दीवृक्षः ( ध. ३.१८ )
नांदुरकी, नांदुरखी.
**कान्ताभ्रकरसायन**-न., सिद्धयोग० पाण्डुशोफोदरानाहग्रहणीशोषकाससंततपुराणविषमज्वरकुष्ठप्रमेहनाशकम् । ( र. २६.४२-४७ )
एक सिद्ध औषध. पांडुरोग, सूज, उदर, पोटफुगी, संग्रहणी, खोकला, सतत रहाणारा किंवा दररोज दोनदा येणारा जुना विषमज्वर, कुष्ट व प्रमेहनाशक.
**कान्तादिरसायन**-न., सिद्धयोग० व्याधिवार्धक्यनाशकमिदम् ( र. २६.३१ )
एक सिद्ध औषध. रोग व म्हातारपण नाशक.
**कान्तायस**-न., खनिज० कान्तलोहभेदः ( रा. १३.२७ )
कांतलोहाचा एक प्रकार.
**कान्तार**-पु., वनस्पति० इक्षुः ( ध. ४.१२० ) ऊस.
**वनस्पति० कोविदारः** ( रा. १०.२९३ ) कांचन.
**देश० कुरुक्षेत्रस्य दक्षिणस्यां दिशि वर्तमानः** ( काखि. २५.१४ )
एक देश. कुरुक्षेत्राच्या दक्षिण दिशेस असणारा.
**( कान्तारिका )**-स्त्री., कीट० मक्षिकाभेदः तद्दष्टस्य कण्डूशोफदाहरुजो भवन्ति ( सुक. ८.३५ )
एक किडा, एक माशी. ती डसल्याने खाज, सूज, आग, वेदना होतात.
**कान्ति**-स्त्री., शोभा ( सुसू. ४५.९६ )
शोभा, तेज.
**वनस्पति० वाराहीकन्दः** ( ध. ४.९२ ) डुक्करकंद.
**-दा**-स्त्री., वनस्पति० बाकुची ( रा. ४.२२८ )
बांवची.
**कान्यकुब्ज**-पु., देश० अत्र स्वर्णसन्निभं माक्षिकमुपलभ्यते ( र. २.८३ )
एक देश, कनोज प्रांत. यात सुवर्णासारखा माक्षिक ( सुवर्णमाक्षिक ) सापडतो.
**कापालिक**-पु., धातूनामुपरि रञ्जनयोगेन जातो रक्तादिवर्णः । सूतस्य खोटबद्धादिरूपस्य अभ्रकसत्त्वादीनां च वङ्गकापालिकानागकापालिकाकालिकादिर्दोषः । कपालिककापीलिककापालिकापरपर्यायाः । कापालिकाः योगाः धातुवादकर्मणि पूर्वं प्रसिद्धाः । लोहादिधातूनां सुवर्णकरणं धातुवादः ( र १०.९६ )
रंजन या क्रियेने धातूंवर उत्पन्न झालेला लाल पिवळा इत्यादि रंग. पाऱ्याचे खोटबंध इत्यादींवर अभ्रक सत्वादिकांवर कथिल, नाग यांचे कापालिका व काळा पापुद्रा इत्यादि दोष निर्माण होतात; कापालिक कापीलिक कापालिका हे पर्याय. धातुवाद म्हणजे कोणत्याही धातूचे सोने करण्याचा विधि.
**कापिल**-वि., कपिलाधेनुसंबन्धि ( असंउ. १६ )
कपिला गाईचे दूध, मूत, दही, तूप इत्यादी तिच्या संबंधींचे.
**-पित्त**-न., जाङ्गम० गोपित्तं, गोरोचनम्, नेत्ररोगे कणादिद्रव्यभावनोपयोगि ( असंउ. १६ )
प्राणिज द्रव्य, गाईचे पित्त, गोरोचन, पिंपळी, इत्यादि द्रव्यांना भावना देण्याला उपयोगी. डोळ्याच्या रोगांवर उपयुक्त.
**-बल**-पु., ऋषि० कपिलबलपुत्रो दृढबलः । तन्त्रपूरणकर्तृष्वेकः ( चचि. ३०.२९० )
एक ऋषी, कपिलबलपुत्र दृढबल आत्रेय संहितेवर ( चरकावर ) संस्कार व न्यूनतेची पूर्ति करणारा ऋषी.
**-वलि**-पु., कापिलबल ( चचि. ३०.२९० )
पहा ' कापिलबल '.
**कापोत**-न., खनिज० अञ्जनम् ( रा १३.२१५ )
सुरमा प्रकार.
**काप्य**-पु., महर्षि० रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः ( चसू. १.११ )
एक मोठे ऋषी. रोगनाशक उपायांचा विचार करण्याकरिता हिमालयाच्या जवळ जमलेल्या महान् ऋषींमधील एक.
**काम**-पु., मनोविकार० विषयेच्छा ( चनि ८.४ )
मनाचा विकार, विषयेच्छा, संभोगेच्छा.
**राजसगुण० भोगेच्छा** ( सुशा १.१८ )
राजसगुण, संभोगाची इच्छा.
**इन्द्रियार्थेष्वभिकाङ्क्षा** ( सुसू. १.२५ ( ३ )
इंद्रियांच्या विषयांची आकांक्षा-इच्छा.
**स्वेषु विषयेष्विन्द्रियाणामानुकूल्यतः प्रवृत्तिः** ( सुशा. १०.५३ )
स्वतःच्या ( इंद्रियांच्या ) विषयाकडे तो ग्रहण करण्याकरिता उत्पन्न झालेली प्रवृत्ति.
**वनस्पति० आम्रभेदः, राजाम्रः** ( रा ११.१० )

एक वनस्पती. आंब्याचा प्रकार, उत्तम आंबा. राजाला खाण्यासारखा आंबा. आंब्याचा राजा.
**वनस्पति० कामदमनकः** ( र ११.९५ )
एक वनस्पति, दवणा.

( **कामा** )–स्त्री., **वनस्पति० काकमाची** ( र. ११.१०९ )
पहा ' काकमाची '.

**–कर्मान्त**–पु., **मदनव्यापारः** ( अरु. ) अहृसू. ३.२४ )
वि., **कामकर्म मदनव्यापारम् अन्तन्ति बध्नन्ति स्वसौन्दर्येणोत्तरोत्तरं वर्धयन्ति इति कामकर्मान्तः मदनव्यापारवर्धकः** ( हे )
वैषयिक आचरण. ( कर्म ) स्वतःच्या सौंदर्यादि गुणांनी विषय वासना उत्तरोत्तर अधिक वाढविणारे व त्यात बद्ध करणारे हावभाव इ० क्रिया.

**–कान्ता**–स्त्री., **वनस्पति० अतिमुक्त–कः** ( रा. १०.२६० )
मोगरा.

**–काली**–स्त्री., **जलचरपक्षि०** ( चसू २७.४४ )
पाण्यात वावरणारा एक पक्षी.

**–खड्गदला**–स्त्री., **वनस्पति० केतकीभेदः** ( रा १० ३–४ )
केतकी, केवडीचा प्रकार.

**–ज**–वि., **विषयवासनाभवज्वरः** ( सुउ. ३९.७८ )
विषयवासनाजन्य ज्वर.

**–जननी**–स्त्री., **तांबूलमूली** ( धपरि ३.२ )
विडा, विड्याच्या पानाची वेल.

**–ज्वर**–पु., **आगन्तुज्वर० विषयवासनाभवः ज्वरः तल्लक्षणम्–ध्याननिःश्वासबहुलत्वम्** ( चचि. ३.१२२ ) **एतस्मिन् किंकर्तव्यतामूढत्वं तन्द्राऽरोचकमालस्यं हृदयवेदना गात्रपरिशोषणं च भवति** ( सुउ ३९.७८ )
एक आगन्तुक ज्वर. विषयवासनाजन्य ज्वर. **लक्षण**– संबद्ध व्यक्तीचे चिंतन व सारखे श्वास टाकणे, काय करावे हे न सुचणे, झांपड, आळस, हृदयात वेदना, अवयव सुकणे व रुचिनाश.

**–दा**–स्त्री., **वनस्पति० तांबूलम्–ली** ( धपरि ३.२ )
विडा, विड्याच्या पानांची वेल.

**–देवरस**–पु., **सिद्धयोग०, अतिवृष्यं रसायनमिदम्** ( र. २७.२८ )
एक सिद्ध औषध, अतिशय वृष्य औषध.

**–धेनु–रस** ( परिव० ) पु., **सिद्धयोग०, अग्निदीप्तिकृद्वृष्यो वपुःस्थैर्यकृच्च** ( र २७.६६ )
एक सिद्ध औषध, अग्निदीपक शुक्रवर्धक व शरीर स्थिर करणारे.

**–पिप्पली**–स्त्री., **मदनबीजम्** ( र. ११.९५ )
गेळफळातील पिंपळी ( मगज ).

**–फल**–पु., **आम्रभेदः, राजाम्रः** ( रा. ११.१० )
उत्कृष्ट आंबा, एक प्रकारचा आंबा.

**–भक्ष**–वि., **यथाकामं भक्षणशीलः** ( चचि.१ ( १ ) ७५ )
यथेच्छ आहार करणारा.

**–मोदी**–स्त्री., **जाङ्गम० कस्तूरिका** ( रा. १२.४८ )
प्राणिज द्रव्य, कस्तूरी.

**–रूपका**–स्त्री., **वनस्पति० वृक्षादनी** ( ध. ४.९७ )
बांडगुळ.

**–रूपिणी**–स्त्री., **वनस्पति० अश्वगन्धा** ( रा. ४.४०१ )
आस्कंद.

**–वती**–स्त्री., **वनस्पति० दारुहरिद्रा** ( रा. ६.८४ )
दारुहळद.

**–वल्लभ**–पु., **वनस्पति० आम्रः** ( रा ११.१ )
आंबा.

**–वृक्ष**–पु., **वनस्पति० वृक्षादनी** ( रा. ५.१४१ )
बांडगुळ.
**वनस्पति० बिंदुकली इति लोके** ( र ११.१०९ )

**–वृद्धि**–पु., **वनस्पति० अस्य बीजमुपयुज्यते । गुणाः–मधुरो बलवर्धनः कामवृद्धिकरो रुच्यो बहुलेन्द्रियवृद्धिदश्च ।** ( रापरि. ४.५१ )
एक वनस्पती. हिच्या बीजाचा औषधांत उपयोग. **गुण**–गोड, बलवर्धक, विषयवासना वाढविणारी, रुचकर, इंद्रिय जाड व लांब करणारी.

**–शर**–पु., **वनस्पति० आम्रः** ( रा. ११.१ ) आंबा.

**कामम्**–अव्य., **यथेष्टम्** ( सुचि. २४.६० )
यथेच्छ, इच्छेप्रमाणे.

**कामयमान**–वि., **अभिलषन्** ( अहृसू. १.२ )
इच्छा करणारा, इच्छिणारा.

**कामल**–न., **कामला एव कामलम्** ( र. ५.७८ )
कामला, कावीळ.

**कामला**–स्त्री., **रोग० पाण्डुरोगभेदः** ( चक. चचि. १६.३४ ) **चत्वारिंशत्पित्तविकारेष्वेकः ।** ( चसू.

२०.१४; ) रक्तदोषजरोगेष्वेकः (चसू. २८.१२) संप्राप्तिः–यः पाण्डुरोगी अत्यर्थं पित्तलानि निषेवते तस्य पित्तमसृग्मांसं दग्ध्वा कामलारोगाय कल्पते। एषा कोष्ठशाखाश्रया बहुपित्ता कामला (चचि. १६.३५) पित्तोल्बणस्य पित्तकरद्रव्यातिसेवनात् पाण्डुरोगादृतेऽपि अयं भवेत् (असंनि. १३.१९) लक्षणानि–कामली हारिद्रनेत्रो हारिद्रत्वङ्नखाननो रक्तपीतशकृन्मूत्रो भेकवर्णो हतेन्द्रियो दाहाविपाकदौर्बल्यसंदनारुचिकर्षितश्च भवति (चचि. १६.३५) पाण्डुरोगान्तेऽन्यरोगान्ते वा अम्लाद्यपथ्यसेविनो वदनं देहश्च विशेषतः पाण्डुर्भवति। तन्द्रा बलक्षयश्च भवतः (सुउ. ४४.१०–११) कफरुद्धपथकामलासंप्राप्तिलक्षणम्–कफसंमूर्च्छितो वायुः यदा पित्तं बहिः क्षिपेत् तदाऽऽतुरः श्वेतवर्चा हारिद्रनेत्रमूत्रत्वग् भवति। क्रमेण च पित्तं यदा शाखासमाश्रितं भवेत् तदा आटोपविष्टम्भहृदयगुरुत्वदौर्बल्याल्पाग्निपार्श्वार्तिहिध्माश्वासारुचिज्वराश्च भवन्ति (असंचि. १८)

कफरुद्धपथकामला शाखाश्रितकामलातो न भिन्नेति चक्रपाणिदत्तः (चचि. १६.१२४–१२७)

बालानां क्षीरजा कामला भवति। तल्लक्षणम्–कुपिते पित्ते स्तन्यं दौर्गन्ध्यम् ऋच्छति। तत्पिबतः शिशोः पाण्ड्वामयः कामला च भवेत्। कामलार्दितो बालः पीतचक्षुर्नखमुखविण्मूत्रो निरुत्साहो नष्टाग्निरुधिरस्पृहश्च भवति (कासू. २५.३५) (चचि. ३०.२४५)

तस्याः असाध्यलक्षणम्–कृष्णपीतशकृन्मूत्रः शूनः सरक्ताक्षिमुखच्छर्दिविण्मूत्रस्ताम्यन् दाहारुचितृषानाहतन्द्रामोहसमन्वितो नष्टाग्निसंज्ञः कामली क्षिप्रं विपद्यते (चचि. १६.३७–३८)

कावीळ, पित्तज ४० रोगांपैकीं एक रोग. पांडुरोगाचा एक प्रकार. रक्तज रोगांपैकी एक. संप्राप्ति–जो पांडुरोगी अतिशय पित्तवर्धक पदार्थ सेवन करितो, त्याचे पित्त रक्त व मांस ह्यांना जाळून कावीळ उत्पन्न करते. ह्याचकारणांनी ही कोष्ट व शाखा या दोन्ही भागांच्या आश्रयाने पुष्कळ पित्ताची कावीळ पांडुरोग नसतानाही होते.

**लक्षणे**–त्वचा नखे डोळे व तोंड, मलमूत्र ही पिवळी व लालसर असतात. पिवळ्या बेडका सारखा रंग दिसतो. आग, दुर्बलता, गळाठा, पचन न होणे, तोंड बेचव असणे यांनी तो बेजार होतो आणि इंद्रिये अशक्त होतात. पांडु अथवा इतर रोगाच्या शेवटी अम्ल द्रव्ये अति सेवन करणाराचे तोंड व सर्व देहच पांढरा पडतो, त्यात झापड असते, शक्ति क्षीण होते.

**कफरुद्धमार्गाची कामला**–कफाने पित्ताचा आन्त्रात जाण्याचा मार्ग अडवला तर वायु पित्ताला बाहेर (बाह्यरोग मार्गात) रक्तात फेकतो. म्हणून बाहेरचे अवयव डोळे, त्वचा, नख, मूत्र ही पिवळी होतात आणि आत–आंत्रांत पित्त नसते म्हणून शौचाला पांढरे होते, व वाताचा अवरोध, पोटफुगी, अग्नि अल्प, अरुचि, हृदय जड, फासळ्यांस दुःख, उचकी, श्वास, दुर्बलता, अरुचि, आणि ज्वर होतात. ही शाखाश्रित कामलेपेक्षा निराळी नाही. लहान मुलांना पित्तदुष्ट दूध प्याल्याने कामला होते. पित्ताने दूध दुर्गंधी होते व ते पिणाऱ्या बालकाला पांडु व कावीळ होते. त्याची नखे, डोळे, मळ, मूत्र, तोंड पिवळी होतात. मूल निरुत्साही होते, अग्नि मंद होतो व रक्त प्यावेसे वाटते. **असाध्य लक्षण**–पिवळेपणा बरोबर मळादिकांना काळसरपणा असतो. सूज, डोळे, तोंड लाल होते, ओकारी मूत्र व मळ यात रक्तही असते. अंधेरी दाह, झापड, मूर्च्छा, अग्निनाश, संज्ञाही नसते. तो लवकर मरतो.

**कामलिन्**–वि., कामलारोगयुक्तः (चसू. १४.१८)
कामला रोगाने युक्त.

**कामाङ्ग**–पु., वनस्पति० आम्रः (ध. ५.१)
आंबा.

**कामाता**–स्त्री., वनस्पति०, काकमाची (हे. अहृसू. ७.३६) पहा 'काकमाची'.

**कामात्ता**–स्त्री., वनस्पति० काकमाची (र. १२.७४; अहृसू. ७.३६)
काकमाची एक वनस्पती, पहा 'काकमाची'.

**कामादिज**–वि., कामादिजन्यं व्याध्यादि (चचि. ३.१२५)
विषयवासना; विषयसेवन व त्यांपासून उत्पन्न होणारे विकार.

**कामानन्दा**–स्त्री., जाङ्गमकस्तूरिका (रा. १२.४७)
प्राणिज द्रव्य.

**कामायुध**–पु., वनस्पति० आम्रभेदः राजाम्रः (रा. ११.१०)
एक उत्कृष्ट आंबा.

**कामारि**–पु., प्राचीनो रसाचार्यः (रा. ६.५१)
प्राचीन रसशास्त्राचे आचार्य.

**कामासक्ता**–स्त्री., ( सुचि. २६.८ )
विषयासक्त. कामातुर.

**कामिन्**–पु., वनस्पति० **ऋषभक** ( रा. ५.१५८ )
ऋषभकः, जीवनीय गणातील एक औषधी.

**( कामिनी )**–स्त्री., वनस्पति० **दारुहरिद्रा** ( रा. ६.८३ )
दारुहळद.
**आसुत० मद्यम्** ( रापरि. १४.३०१ )
मद्य, दारू.
**वृक्षादनी** ( ध. ४.९७ ) .
बांडगुळ.

**कामेश्वर**–पु., सिद्धयोग० **शोफपाण्डुनाशनोऽयम्** ( रा. १९.११० )
सिद्ध औषध सूज व पांडुरोग नाशक.

**कामेश्वरमोदक**–पु., सिद्धयोग० **अयं रसराट् क्षयनाशको वृष्यताऽऽपादको नैकव्याधिहरो बुद्धिप्रागल्भ्यकृच्च** ( र. २७.१२६–१२९ )
एक सिद्ध औषध. हा रसांचा राजा क्षयनाशक, शुक्रवृद्धि करणारा, अनेक रोगनाशक व बुद्धि प्रगल्भ करणारा.

**कामेष्ट**–पु., वनस्पति० **आम्रभेदः राजाम्रः** ( रा. ११.८ )
एक उत्कृष्ट आंबा.

**कामोपजीव**–पु., वनस्पति० **कामवृद्धिः** ( रा. ४.५१ )
एक वनस्पती. पहा ' कामवृद्धि '.

**काम्पिल्लक**–पु., वनस्पति० **कपिल्लकः** ( असंसू. १४.४ )
कपिला.

**काम्पिल्यराजधानी**–स्त्री., देश० ( चवि. ३.३ )
दक्षिण पांचाल. कांपिल्ल.

**काम्बलिक**–पु., यूष० **दधिलवणतिलादिकृतः ईषदम्लः** ( चक्रः चसू. १३.२३ )
दही, सैंधव, तीळ इत्यादियुक्त थोडा आंबट असा यूष.
**दधिमस्त्वम्लसिद्धयूषः** ( ड. सुउ. ४२.९६ )
दह्याची निवळ घालून सिद्ध केलेले मूग इत्यादिकांचे आंबट कढण.
**सौवर्चलाजाजीबीजपूरकसौरभैः संयोज्य मथितः स्वच्छः काम्बलिको भवेत्** ( सुसू. ४६.३७६ )
पादेलोण, जिरे, महाळुंग, व सुगंधी द्रव्ये दह्यात घालून घुसळले व लोणी काढले किंवा फडक्यातून गाळले की कांबलिक होते.

**काम्बोजिका**–स्त्री., वनस्पति० **कूविका माषपर्णी (गयी) बाकुची** ( रा. ४.२२७ )
( डसुचि. १९.४२–४३ )
एक वनस्पति. रानउडीद, बांवची.
**रक्तगुञ्जा** ( र. १६.१४ ) लाल गुंज.

**काम्बोजी**–स्त्री., वनस्पति० **बाकुची** ( रा. ४.२२७ )
बांवची.
**माषपर्णी** ( ध. १.१३६ ) रानउडीद.

**काम्भोजी**–स्त्री., वनस्पति० **खदिरभेदः, विट्खदिरः** ( रा. ८.३८ )
खैराचा प्रकार, शेण्याखैर.
**गुञ्जा** ( रा. ३.४७ ) गुंज.

**काम्ली**–स्त्री., पार्थिव० **सौराष्ट्री** ( असंउ. ९. इंदु )
तुरटी.

**काय**–पु., **शरीरम्** ( अहृसू. १.१ ) देह, शरीर, काया.
**चित्तप्रकृतिः** ( सुशा. ४.८८ ) मनाची प्रकृती.
**चीयते प्रशस्तदोषधातुमलैरिति कायः** ( अरु. ) ( अहृसू. १.५ )
ज्याच्यात विशुद्ध दोष धातु मळ एकत्रित होतात तो देह.

**–चिकित्सा**–स्त्री., **आयुर्वेदाङ्गविशेषः ज्वरातिसारप्रभृतीनां कायरोगाणां संशमनं षट् कायचिकित्सा तन्त्राणि–अग्निवेशभेडजातुकर्णपराशरहारीतक्षारपाणिप्रोक्तानि ।** ( सुउ. १.६ )
आयुर्वेदाचे एक अंग. ज्वर, अतिसार इत्यादी शारीर रोगांचे उपचार. अग्निवेश, भेड, जातुकर्ण, पराशर, हारीत, व क्षारपाणी या सहा ऋषींनी रचलेले ६ कायचिकित्सा ग्रंथ.
**कायस्य नाम अन्तरग्नेश्चिकित्सा** ( चसू. ३०.२८ )
काय म्हणजे आतला–शरिरातला अग्नि, त्याची चिकित्सा.
**देहचिकित्सा** ( सुसू. १.७ )
शरिराची चिकित्सा.

**–छिद्र**–न., **शरीरस्रोतः** ( चइं. १२.५२ )
शरिराची द्वारे; शरिरात असलेली स्रोतसे.

**–निबन्धन**–न., **योगपट्टम्** ( चक्र. चशा. ५.१२ )
योग्याच्या कमरेचे वस्त्र.

**–मान**–न., **तृणादिरचितागारम्** ( हे ) अरु. अहृसू. १३.९ )
**वेण्वादिनिष्पादितगृहम्** ( अरु. ) **शिबिरम्** ( हे अहृसू. ३.३५ )

गवताचे घर. झोपडी. बांबू इत्यादींनी केलेले गृह.

**–यात**–पु., **वनस्पति० विकण्टकः** ( रापरि. ११.१९ )
एक वनस्पती, वेहेकळ. बेहळी.

**–रेक**–पु., **विरेचनम्** ( हे अहृसू. १४.५ )
रेचक.

**–स्था**–स्त्री., **वनस्पति० आमलकी** ( चक्र. चचि. २६.८३ )
एक वनस्पती. आवळकाठी.
**सुरसा** ( चक्र. ) ( चचि. १७.१४१ ) तुळस.
**हरीतकी** ( रा. ११.३०७ ) हिरडा.
**एलाभेदः भद्रैला** ( रा. ६.७१ )
मोठा वेलदोडा.
**एलाभेदः सूक्ष्मैला** ( रा. ६.६९ )
सूक्ष्म–लहान वेलदोडा.
**तुलसी** ( रा. १०.७७ ) तुळस.
**हरीतकी सुरसश्च** ( इन्दु. असंउ. ९ ) हिरडा.

**कायाग्नि**–पु., **कायनिर्वर्तकः अग्निः जाठराग्निः** ( चसू. ६.२२ )
जठराग्नि, पाचक अग्नि.

**कार**–न., जलभेदः **आन्तरीक्षजलप्रकारेष्वेकम्, करा वर्षोपलास्तेषां तोयं कारम् तच्चाऽव्यक्तरसम् । ऐन्द्रं कारं हिमं च यज्जलं तदव्यक्तरसं विद्यात्** ( चसू. २७.२०० ) ( सुसू. ४५.७ ) द्र० 'जल'
पाण्याचा प्रकार. आकाशातून पडणाऱ्या पाण्याचा एक भेद. गारांचा वर्षाव होतो. ती गार म्हणजे करा, तिचे पाणी कार. या पाण्याला व्यक्त रस नसतो. पाऊस, गारा व बर्फ यांच्या पाण्याला रस नसतो. पहा 'जल.'

( **कारी** )–स्त्री., वनस्पति० **'कारी तु कारिका कार्या गिरिजा कटुपत्रिका । तत्रैता कण्टकारी स्यादन्या त्वाकर्षकारिका'** ॥ ( रा.परि. ८.२६ ) **गुणाः– कषायमधुरा गुरुर्दीपनी ग्राहिणी रुच्या कण्ठशोधनी पित्तनाशनी च** ( रापरि. ८.२६ )
एक वनस्पती. कारिका, कार्या, गिरिजा, कटुपत्रिका ही दुसरी नावे. यात एकीला काटे असतात. दुसरी आकर्षण करते. **गुण**––तुरट, गोड, जड, अग्नि वाढविणारी, मळ घट्ट करणारी, कंठ शुद्ध करणारी, पित्तशामक व रुचकर.

**एक**–पु., **कारणं, निदानम्** द्र० 'निदान'. ( असंनि. १ )
कारण; हेतु; निदान. पहा "निदान"
वि., **करको वर्षोपलस्तद्भवं जलं, कारं जलमित्यर्थः ।** ( र. १४.३५१ )
पावसाची गार. करका, तिचे पाणी.

( **कारिका** )–स्त्री., **वनस्पति० कारी** ( रापरि. ८.२६ )
पहा 'कारी'

**कारञ्ज**–वि., **करञ्जस्येदम् कारञ्जफलम्** ( चसू. २७.१६० ) ( सुसू. ३७.३२ )
करंजाचे फूल, फळ, साल, मूळ इत्यादी.

**कारण**–न., **अनन्यथासिद्धकार्यनियतपूर्ववृत्ति । यथा तन्तुवेमादिकं पटस्य कारणम्, हेतुः** ( सासं जातिसू० ) **निदानम्, "इह खलु हेतुर्निमित्तम् आयतनं कर्ता कारणं प्रत्ययः समुत्थानं निदानमित्यनर्थान्तरम्"** ( चनि. १.३ )
**कारणं नाम तद् यत्करोति, स एव हेतुः स कर्ता ।** ( चवि. ८.६९ )
त्याच कार्याचे व कार्य होतांना तेथे विद्यमान असलेले ते कारण. वस्त्राचे तंतु, धोटा, साळी इत्यादी कारण होत. हेतु, निमित्त, आयतन, कर्ता, कारण, प्रत्यय, समुत्थान, निदान हे पर्याय. कारण म्हणजे ते जे करते तोच हेतु.
**आत्मा भूतात्मा चेन्द्रियात्मा चान्तरात्मा** ( चशा. ४.८ )
आत्मा. प्राण्याचा आत्मा, इंद्रियांचा आत्मा, शारीरात असलेला आत्मा.

**–ज्ञ**–वि., **तत्त्वज्ञानी** ( चशा. १.४१ )
कारण जाणणारा. तत्व जाणणारा.

**कारणानुरूपं कार्यम्**–**कारणे ये गुणाः सन्ति तेषां कार्येऽप्यनुबन्धो भवति, यद्गुणं कारणं तद्गुणं कार्यमिति** ( सांख्यसिद्धान्तः ) ( सुशा. १.१० )
कार्य कारणानुरुप असते. कारणाच्या गुणांचे कार्यामध्ये सुद्धा अस्तित्व असते. ते गुण कार्यात येतात. कारण ज्या गुणांचे त्या गुणांचे कार्य असा सांख्यांचा सिद्धांत.

**कारणानुविधायि कार्यम्**–**कार्यस्य कारणानुरूपत्वम्** ( असंशा. २.४ )
कार्य हे कारणानुरूप असते.

**कारण्डव**–पु., **काकवक्त्रो दीर्घचरणः कृष्णवर्णो हंसविशेषः संघातचारिप्लवेष्वेकः** ( चसू. २७.४१ ) **अन्ये करड ( ई ) वमाहुः** ( सुसू. ४६.१०५ )

एक प्रकारचा हंस. कावळ्यासारख्या तोंडाचा पाय मोठे असलेला. काळ्या रंगाचा, समुदायाने पोहणाऱ्या पक्ष्यांतील एक. याला करहव, करहई असे ही म्हणतात.

**कारभ**–वि., **करभायाः नाम उष्ट्र्या इदं पयस्, न; औष्ट्रं दुग्धम्**; द्र० '**उष्ट्रः**'
( चचि. १३.१८३–१८४ )
उंटिणीचे जे ते. दूध, मूत्र इत्यादि. उंटिणीचे दूध. पहा 'उष्ट्र.'

**–मूत्र**–न., **औष्ट्रं मूत्रम्**, द्र० '**उष्ट्र.**'
( सुसू. ४५.२२८ ) ( सुचि. ९.६९ )
उंटिणीचे मूत. पहा 'उष्ट्र'

**कारम्भा**–स्त्री., **वनस्पति० प्रियङ्गुः** ( ध. ३.१६ )
गव्हला, वाघांटी, राळा, कांग.

**कारली**–स्त्री., **वनस्पति० कारवल्ली** ( र.२२.१२४ )
कारली, कारले.

**कारवल्ली**–स्त्री., **वनस्पति० कटुरसफलपत्रा शाकवल्ली अस्याः फलं शाकफलमिति उपयुज्यते ।**
( र. १२.३० ) ( रा. ७.२७८ )
गुणाः—**तिक्ता, उष्णा, दीपनी, रक्तदोषकरी, कफवातघ्नी, अरोचकघ्नी, च** ( रा. ७.२७८ )
हिं.—करेला, करेली.
म.—**कारले.**
गु.—कारेला. कडवा वेला.
बं.—बडकरेला उच्छे; छोटकरला उच्चे.
त.—पाकै, मितिपाकल.
फा.—कारेलाह.
एक वनस्पती. कारली, कारले, कडुरसाची पाने व फळ असलेली. हिच्या फळाची भाजी करितात. **गुण**—कडू, उष्ण, अग्निदीपक, रक्तदोषकर, कफ व वातनाशक व अरुची नाहोशी करणारी.

**कारवी**–स्त्री., **वनस्पति० अजमोदा** ( असंचि. १६ )
एक वनस्पती. अजमोदा, ओवा.
**अजगन्धा** ( ध. २.१०० ) तिळवण, कानफोडी.
**जीरकभेदः, कृष्णजीरकम्** ( चसू. २७.३०७ )
द्र० "**जीरक**"
जिऱ्याचा प्रकार. काळे जिरे. पहा. 'जीरक'
**यवानी** ( ड सुसू. ४६.२३० ) ओवा.
**राजिका** ( ड सुसू. ६४.२३० ) मोहरी.
**स्वल्पद्राक्षा, गोस्तनिका** ( चचि. २४.१८२ )
लहान द्राक्ष,
**अल्पजीरकम्**, द्र० '**जीरक**' ( चचि. १३.१२६ )
लहान जिरे.
**शतपुष्पा** ( ध. २.१ ). बडिशेप.
**कुडहुञ्ची ( क्षुद्रकारलिका )** ( रा. ७.२८० )
लहान कारले.

**कारवेल(क)**–न., **वनस्पति० कारवल्ली** ( असंसू. ७.१२२, सुसू. ४७.२६९ )
वनस्पति. कारली. कारले.
पु., **खनिज० खर्परप्रकारः, कारवेल्लवर्णत्वात् आकारत्वाच्च कारवेल्लक इति संज्ञा**
( र. २.१५२ )
कलखापरीचा प्रकार. कारल्याचा रंग व आकार असतो म्हणून.

**( कारवेली )**–स्त्री., **वनस्पति० कारवेल्लिका**
( र. २.३०-३१ )
एक वनस्पती. कारली. कारल्याची वेल.

**( कारवेलीका )**–स्त्री., **वनस्पति० कारवल्ली**
( सुसू. ३९.५ )
एक वनस्पती. कारली. कारल्याची वेल.

**कारस्कर**–पु., **वनस्पति० विषतिंदुः, गुणाः कटुस्तिक्तः उष्णः कफवातजित् वातामयास्रकण्डूतिकुष्ठामार्शोव्रणापहः 'कारस्करस्तु किंपाको विषतिन्दुर्विषद्रुमः । गरद्रुमो रम्यफलः कुपाकः कालकूटकः ॥'** ( रापरि. ९.३५ )
हिं.—कुचला.
**म.—काजरा. कुचला.**
गु.—झेर कोचला.
बं.—कुंचिले.
ता.—विषमुष्टि.
फा.—इफराकी.
कुचला. गुण—कडु, तिखट, उष्ण, कफवातनाशक, अतिशय खाज, कुष्ठ, मूळव्याध, व्रण, रक्त व वातविकारनाशक.

**कारीष**–वि., **करीषस्येदम्** ( सुसू. ४६.२९३ )
करीष—गोवरी, शेणी. गोवरीचे ते; चूर्ण, राख इत्यादी.

**कारेणव**–वि., **करेणुर्हस्तिनी तद्भवम्**
( सुसू. ४५.१०४ )
हत्तिणीचे दूध, तूप, मूत. इत्यादी.

**कार्कट**–पु., **वनस्पति० कर्कटः** ( रा. ११.३३१ )
तांबडा ऊस, एक विष,

**कार्कश**–न., **शाकविशेषः, स्वल्पकर्कोटकः** ( चसू.२७.९७ )
एक भाजी. लहान कर्टोले.

**कार्कश्य**–न., **लक्षण० दुःस्पर्शत्वं, कठिनत्वम्, परुषत्वम्** ( असंनि. ५.५१ )
एक लक्षण. स्पर्श करण्याला त्रासदायक. कठीण. खरखरीत.

**कार्तस्वर**–न., **खनिज० सुवर्णम्** ( रा. १३.२ )
खाणीतले सोने.

**कार्तिक**–पु., **कालविभाग० चैत्रादिद्वादशमासेष्वेको मासः** ( र. १५.३९ )
काळाचा एक विभाग. चैत्र इत्यादी बारा महिन्यांपैकी एक महिना.

**कार्पास**–न., **भैषज्य०, तूलः** ( सुसू. १८.१६ )
एक औषध. कापूस, रुई, कपास, कपासी, कापसी.
**कार्पासतन्तुविरचितं वस्त्रम् व्रणबन्धनद्रव्येष्वेकम्** ( सुसू. १८.१६ )
कापसाच्या धाग्यांचे विणलेले कापड. कापसाचे वस्त्र. व्रणबंधनद्रव्यापैकी एक द्रव्य.
पु., **वनस्पति० कार्पासी** ( र. २३.६ )
कपाशी. कापसाचे झाड.

**( कार्पासी )**–स्त्री., **स्वनामख्याता वनस्पति०** ( रा. ४.२४, असंशा. ३.१४ )
**गुणाः–मधुरा शीता स्तन्या बलकारिणी पित्त-कफघ्नी, तृष्णा-दाह-श्रम-भ्रान्ति-मूर्च्छाहरा च । कार्पासः कार्पासिका, कार्पासिकी इत्यपि अस्याः नामानि सन्ति** ( रा. ४.४५ )
हिं.—कपास. वनकपास.
म.—**कापशी. कापूस.**
गु.—वणरु कपास.
बं.—कार्पास, वनकार्पास.
त.—परुत्ति, उत्तिरी.
फा.—कुतुन, पुंवेदना.
एक वनस्पती. कपाशी, कापूस. गुण–गोड, थंड, दूध वाढविणारी, बलकर, कफपित्तनाशक, तहान, दाह, थकवा, भ्रांती व मूर्च्छानाशक.

**–पिचु**–पु., **कार्पासखण्डः** ( चशा. ८.४३ )
कापसाचा तुकडा, गोळा, बोळा.

**–मूल**–न., **कार्पास्याः मूलं, विषजोन्मादे पानार्थम् उपयुज्यते** ( असंउ. ४७ )
कपाशीचे मूळ. विषज उन्मादात काढा पिण्यास उपयोगी.

**–विहितोष्णीषा ( शलाका )**–वि., **कार्पासेन विहितम् उष्णीषं शिरोवेष्टनमिव यस्याः सा ( शलाका )** ( अहृसू. २५.३४ )
डोक्याला वस्त्र गुंडाळल्याप्रमाणे कापूस टोकाला गुंडाळलेली सळई. काडी इ. फाया असलेली सळई.

**कार्पासास्थि**–न., **कार्पासबीजम्** ( चचि. १८.७५ )
**गुणाः—स्तन्यदं वृष्यं स्निग्धं कफकरं गुरु च** ( र. २३.६ )
कपाशीचे बी, अंगावरील दूध, शुक्रधातु वाढविणारे, स्निग्ध, कफकारक, जड.

**कार्पासिनी**–स्त्री., **अरण्यकार्पासी ( भारद्वाजी ) पानात्यये शमनी, वातसंशमनगणे** ( सुसू. ३९.७ ) ( सुउ. ४७.३४ )
रानकपाशी. पानात्यय नामक मद्यपान जन्य विकार शामक. वात–शामक गणांतील.

**कार्मण**–पु., न., **परद्रोहार्थो मन्त्रादियोगः** ( चचि. २३.५९ असंसू. ८ )
दुसऱ्याचे वाईट करण्याकरिता मंत्रादि प्रयोग. करणी. जादुटोणा. चेटुक.
**वशीकरणम्** ( असंउ. ४० ) वशीकरण.
**कृत्रिमयोगः** ( इन्दु. असंउ. १० ) कृत्रिम योग.

**कार्मिक**–वि., **कर्मोपयोगी** ( असंउ. ४२ )
कर्माच्या उपयोगी.

**कार्मुक**–वि., **कार्यकरम्** ( सुसू. ४१.५ )
कार्य करणारे, कार्यकारी, कार्यतत्पर.
पु., **वनस्पति० अतिमुक्तकः** ( ध. ५.१५३ )
कस्तुरमोगरा–मोगरी.
**वंशः** ( ध. ४.१३७ ) वेळू.
**खदिरविशेषः सोमवल्कः, श्वेतसारः द्र० 'खदिर'** ( ध. १.२७ )
एक खैर. पांढरा खैर.
**महानिम्बः** ( ध. १.३१ ) बकाणा निंब.
**हिज्जुलः** ( रापरि. ८.७० ) जलवेतस.

**( कार्मुका )**–स्त्री., **पुष्पवती माधवी लता । अतिमुक्ता** ( अहृसू. १५.३० )
फुललेली माधवी. कस्तुर मोगरी. रायनेवाळी.

**कार्य**–न., **कार्यं तु तद् यस्याभिनिर्वृत्तिम् अभिसंधाय प्रवर्तते कर्ता** ( चवि. ८.७२ ) **कार्यं प्रागभाव-प्रतियोगि ( तर्कसंग्रहः )**

कार्य ते की ज्याच्या निर्मितीकरिता कर्ता प्रवृत्त होतो, उद्युक्त होतो व ते निर्माण करतो. कार्य म्हणजे अगोदर असलेल्या अभावाचा प्रतियोगी. प्रतिपक्षी ज्याचे अस्तित्व ते निर्माण होण्यापूर्वी नव्हते ते. अस्तित्ववान् प्रथम असलेल्या अभावाचा विपरीत भाव.

**( कार्या )**-स्त्री., **वनस्पति० कारी** ( रापरि. ८.२६ )
एक तिखट पानांची पित्तनाशक वनस्पती. हिलाच कारी असेही नाव आहे.

**–ज्ञान**–न., **कार्यप्रवृत्तिजनकबाह्यविषयज्ञानम्** ( चशा. ३.१९ )
कार्याची प्रवृत्ति निर्माण करणाऱ्या बाह्य विषयांचे ज्ञान.

**–निमित्त** वि., **कार्योत्पन्नः भावः** ( चवि. ८.७४ )
कार्योत्पत्तीनंतर उत्पन्न झालेला भाव.

**–निवृत्ति** स्त्री., **व्याधेरुपशमः** ( सुउ. १८.४७ )
रोगाचा उपशम, रोग नाहीसा होणे.

**–प्राप्ति**–स्त्री., **कार्योत्पत्तिः** ( च. वि. ८.८४ )
कार्याची उत्पत्ति.

**–फल** न., **कार्यफलं पुनस्तत् यत्प्रयोजना कार्याभिनिर्वृत्तिः इष्यते** ( चवि. ८.७३ )
कार्याचे फळ. ज्याकरिता कार्य केले ते.

**–योनि**–स्त्री., **कार्ययोनिस्तु सा या विक्रियमाणा कार्यत्वमेव आपद्यते उपादानकारणं समवायिकारणं वा** ( चवि. ८.७१)
ज्यामध्ये फरक–बदल होऊन त्याला कार्याचे स्वरूप प्राप्त झाले ते. ज्याच्या विकृतीने कार्य निर्माण झाले ते. कार्याचे घटकरूप कारण कार्याबरोबर असणारे, उपादान कारण किंवा समवायि कारण.

**कार्शी**–पु., **वनस्पति० कर्चूरः** ( ध. ३.९४ )
कचोरा. काचरी. आंबेहळद.

**कार्श्य**–न., **लक्षण० कृशता, उपशोषिताल्परसधातुजन्यं मांसहीनशरीरं मांसक्षयो वा** ( सुनि. ३.१७ ) **रोग०** ( चचि. ११.६५ ) **रसदोषजविकारेष्वेकः** ( सुसू. २४.९ ) **रसनिमित्तमेव स्थौल्यं कार्श्यं च** ( सुसू. १५.३२ ) **स्थौल्यात् कार्श्यमेव वरम्** ( असंसू. २४.५१ ) ( अहृसू. १४.३१ ) **क्षुधो निग्रहात् जायते तथैव वृद्धो वातः कार्श्यादीन् कुरुते** ( अहृसू. ४.११. ( १.६ ); **कार्श्यजनकानि कारणानि रूक्षान्नपानानां सेवा, लङ्घनं, प्रमिताशनं वा, वमनादिक्रियातियोगः शोकः वेगनिद्राविनिग्रहो रूक्षस्योद्वर्तनं, स्नानस्याऽभ्यासः जरा प्रकृतिः–आनुवंशिकी कृशप्रकृतिर्विकारानुबन्धः क्रोधश्च । कृशस्य लक्षणानि–कृशो न सहते व्यायामं अतिसौहित्यं, क्षुत्पिपासामयौषधमतिशीतोष्णमैथुनम् । कृशं प्रायो ग्रहणीगता रोगाः प्लीहा कासः क्षयः श्वासो गुल्माऽर्शांस्युदराणि चाभिबाधन्ते ।** ( चसू. २१.११–१४ ) **कार्श्ये चिकित्सासूत्रम्–तत्र सर्वं पानान्नभेषजं बृंहणं योजयेत् । अचिन्तया चित्ततुष्ट्या प्रियदर्शनादिना ध्रुवं संतर्पणेन निद्राभ्यासेन च कृशो वराह इव पुष्यति ।** ( अहृसू. १४.३३-३४ )
एक लक्षण. कृशता, किडकिडीतपणा. ज्याचा रसधातु शोषला गेला त्या अल्प रसधातूमुळे कमी असलेल्या मांसयुक्त शरिराचा दिसणारा धर्म–**गुण–स्वरूप**–मांसक्षय एक रोग–रस धातुजन्य विकारातील एक. रसामुळेच स्थूलता आणि कृशता. स्थूलतेपेक्षा कृशता चांगली. **कारणः**–भुकेचा ताण, सतत सोसण्याची खोड असणाऱ्याला तसेच इतर कारणांनीही वात वाढल्यामुळे कृशता इत्यादी होतात. रूक्ष अन्नपान, लंघन, मोजके किंवा अल्प खाणे, एकच रस आहारात घेणे, ओकारी, रेचक इत्यादी शोधने एक सारखी घेणे, प्रमाणातिरेक करणे, शोक करणे, झोप न घेणे, रूक्ष द्रव्यांचे उटणे लावणे, स्नाने वारंवार करणे, म्हातारपण, आनुवंशिकता, विकार दीर्घकाळ रहाणे, वातप्रकृति, सतत क्रोध. **लक्षणे**–व्यायाम न सहन होणे, अतिशय खाणे सहन न होणे, भूक, तहान, रोग, औषधे, अति थंडी, उष्णता व संभोग ही सहन न होणे. **रोग**–कृश मनुष्यास बहुधा संग्रहणी, प्लीहावृद्धि, खोकला, क्षय, श्वास, गुल्म, मूळव्याध, उदर हे विकार होतात. **उपचार**–पौष्टिक, चिंता न करणे, संतुष्ट असणे, आवडती दृश्ये, चित्रे वाचन ठेवणे, झोप आणि नेहमी पुष्टिकर आहार, यांनी मनुष्य डुकरासारखा पुष्ट होतो.

**वनस्पति० सर्जकः** ( रा. ९.२०४ ) राळ.

**वनस्पति० कर्चूरः** ( ध. ३.९४ )
कपूरकाचरी, काचरी.

**वनस्पति० लकुचः** ( रापरि. ९.४४ )
ओटीचे फळ, लहान फणस.

**कार्षिक**–वि., **कर्षप्रमाणम्** ( चचि. १३.१६३ )
तोळाभर.

**कार्ष्णगन्धिक**–वि., कृष्णगन्धः शोभाञ्जनः, तत्कृतः कार्ष्णगन्धिकः पिण्डः ( चचि. १४.४२ )
कृष्णगंध–शेवगा. त्याच्या पासून केलेला ( कार्ष्णगन्धिकः पिण्डः ) वाटलेला गोळा.

**कार्ष्णायस**–न., कृष्णलोहपात्रं, 'कान्तलोहपात्रम्' इत्यन्ये ( सुसू. ४६. ४४९ )
काळ्या लोखंडाचे–कान्तलोहाचे पात्र.

**कार्ष्णी**–स्त्री., वनस्पति० शतावरी ( रा. ४.४४० )
शतावरी.

**कार्ष्ण्य**–न., कृष्णवर्णता ( चशा. ४.१६ )
काळेपणा. काळा रंग असणे.
**खनिज० मण्डूरः** ( रा. १३.३६ )
मंडूर.

**काल**–वि., कृष्णवर्णः ( का. मूत्रकृच्छ्रचि. )
काळा रंग.

पुं., नवद्रव्येषु एकं द्रव्यम् । 'खादिन्यात्मा मनः कालो दिशश्च द्रव्यसंग्रहः ।' ( चसू. १.४८; ) क्षणादिव्यवहारहेतुः । कालो हि भगवान् स्वयम्भूः अनादिमध्यनिधनः । संकलयति कालयति वा भूतानि इति कालः । कलयति संक्षिपतीति वा कालः, अथवा कालयति मृत्युसमीपं नयति इति वा कालः, अन्ये 'कालयति' इत्यत्र कलयति इति पठन्ति, कलयति संख्याति इति वा कालः । संकलयति भूतानीति वा, सुखदुःखाभ्यां भूतानि योजयतीति वा । ( सुसू. ६.३ ) स एव संवत्सरादिस्वरूपो जगतः सृष्टिस्थितिप्रलयनिमित्तमिति कालकारणिकाः । ( सुशा., १.११; ) स द्विविधः– संवत्सरो नित्यगो वा, आतुरावस्था आवस्थिको वा ( चवि. ८.८४; ) ( चवि. १.२२ ) ( सुसू. ४६.४६४ ) तत्र संवत्सरो द्विधा, त्रिधा, षोढा, द्वादशधा भूयश्चाप्यतः प्रविभज्यते तत्तत्कार्यमभिसमीक्ष्य ( चवि. ८.१२५ )
द्विधा–आदानविसर्गभेदेन, त्रिधा–शीतोष्णवर्षलक्षणः, षोढा–वसन्तादिऋतुभेदेन, द्वादशधा–काष्ठा, कला, नाडिका, मुहूर्त, यामाहोरात्रपक्षमासर्त्वयनवर्षभेदेन ( असंसू. ४.४; ) ( असंसू. २३.९ ) ( चसू. २६.१३ ) चिकित्सिते अवेक्षाभेदेनाऽवस्थाभेदेन च कालस्य विभागो यथा– दिनाऽऽतुरौषध–व्याधि–जीर्णलिङ्गर्तुभेदेन षड्विधः । तत्र दिनावेक्षो यथा पूर्वाह्णे वमनम्, आतुरावेक्षो यथा बलवान् प्रातर्निरन्नो भेषजं पिबेत्; दुर्बलस्तु लघुपथ्यान्नैर्युक्तं भेषजमद्यात् । औषधावेक्षं यथा– भैषज्यकालः प्रातरेव निरन्नं तथा प्राग्भोजनं च, प्रातर्भोजनोत्तरकालं, सायं भोजनोत्तरकालं, मध्येभुक्तं तु यदर्धं भुक्त्वोपयुज्यते, पश्चात् पुनरर्धं भुज्यते; मुहुर्मुहुः सभक्तम् अभक्तं वा भुज्यमानम्; सामुद्गं नाम यद् भक्तस्याऽऽदावन्ते च, अन्तराभक्तं नाम यदन्नेन संयोगात् संस्काराद्वातद्विमिश्रितं भुज्यते । ग्रासग्रासान्तरं चैवं दश भैषज्यकालाः । तथैवाऽपाने विगुणेऽन्नादौ, समाने विगुणे भोजनमध्ये, व्याने विगुणे प्रातराशस्योदाने भोजनोत्तरं वायौ प्राणे प्रदुष्टे तु ग्रासग्रासान्तरिष्यते । श्वासकासपिपासासु मुहुर्मुहुः अवचार्यम् । हिक्किने लघुनान्नेन संयुतं सामुद्गं देयम्; अरुचौ तु विचित्रैर्भोज्यैः संयुक्तमौषधं हितम्, व्याध्यवेक्षः कालो यथा–ज्वरे आमयस्य कालं वीक्ष्य ज्वराहादारभ्य षडहे यथाक्रमं पेयाकषाय–क्षीर–सर्पिः– विरेचनं देयम् । जीर्णलिङ्गापेक्षः कालो यथा–क्षुद्वेगमोक्षौ लघुतां विशुद्धिं जीर्णलक्षणं चावेक्ष्य भेषजमादेयमन्यथा हि दोषवत् स्यात् । ऋतुकालावेक्षं यथा–दोषाणां चयादीन् वीक्ष्य ऋतौ अवेक्ष्य सेव्यं वर्ज्यं वा आहारविहारौषधादिकर्म चिकित्सा कार्या ( चचि. ३०.२९६–३०६ )

सृष्ट द्रव्ये नऊ. त्यांपैकी एक. आकाश, वायु, अग्नि, जल, पृथ्वी, आत्मा, मन, काल व दिशा ही नऊ द्रव्ये. क्षणादि काल व्यवहाराकरिता आहे; कारण काल भगवान स्वतःच असलेला, कोणीही निर्माण न केलेला, ज्याला आरंभ, मध्य, शेवट नाही असा, जो प्राण्यांना मारून एकत्र करतो, जो नष्ट करतो, मृत्यूजवळ नेतो, जो मोजतो, गणना करतो. प्राण्यांना सुखदुःखाची योजना करतो तो. असे अनेक अर्थ कल् धातूचे असल्याने काल ही संज्ञा निरनिराळ्या स्वरूपाने व्यक्त होते. कालच संवत्सरादि रूपाने जगाची उत्पत्ति, स्थिति आणि नाश यांना कारण आहे.
काल प्रकार २ नित्यग ( क्षणादि ) व रोगावस्था. आदान व विसर्ग २ प्रकारचा संवत्सर काल. शीत वर्षा व उष्ण या भेदाने ३ प्रकारचा व काष्ठ, कला, नाडिका, मुहूर्त, प्रहर, दिवस, रात्र, पक्ष, मास, ऋतु, अयन, वर्षभेदाने १२ प्रकारचा. चिकित्सेत अपेक्षा व अवस्थाभेदाने कालाचे विभाग–दिवस, रोगी, औषध,

रोग, जीर्णता, ऋतु-भेदाने ६ प्रकार. याची उदाहरणेः- (१) दिवसाला अनुलक्षून सकाळी वमन योग्य. (२) रोगी पाहून बलवान असेल तर अनशेपोटी औषध, अबल असेल तर हलके पथ्याचे अन्नाबरोबर (३) औषध देण्याचे काल या दृष्टीने–१ **सकाळीच कांही न खातां** आणि **भोजनापूर्वी, सकाळच्या** भोजनानंतर, **सायंकाळच्या** भोजनानंतर, अर्धे जेवण झाल्यावर औषध घेऊन पुनः जेवण करणे हे **मध्यभुक्त**; कांही न खातां किंवा खाल्ल्यावर औषध घेणे ते **मुहुर्मुहुः**; आरंभी औषधानंतर जेवण व पुन्हां औषध असे औषध घेणे ते **सामुद्ग**; मिश्र करून किंवा संस्कार करून अन्नाशी औषध घेणे ते **अंतराभक्त**; आणि प्रत्येक घासाबरोबर औषध घेणे ते **ग्रासग्रासांतर** असे १० काळ आहेत. तसेच **अपानदुष्टीवर** भोजनापूर्वी. **समानदुष्टीवर**–भोजनामध्ये. **व्यानदुष्टीवर**–सकाळच्या जेवणावर. **उदानदुष्टीवर**–सायंभोजनोत्तर, **प्राणदुष्टीवर**–प्रत्येक घासाबरोबर. **श्वास, कास**,–तहानेच्या उपद्रवात वारंवार **उचकीवर**–लघु अन्नाबरोबर सामुद्ग. **अरुचीवर**–नाना प्रकारच्या अन्नात मिश्र करून (४) **व्याधिकाल**–ज्वरात रोगावस्थेला अनुसरून ६ व्या दिवसापासून पेज, काढा, दूध, तूप, रेचक देण्याचा काल सांगितला आहे. (५) जीर्णरोगावस्थेत–ज्वरात दोष जीर्ण झाल्यावर भुकेचा वेग येणे, टळणे, हलकेपणा, शुद्धि व पचन पाहून औषध द्यावयाचे असते. (६) ऋतु–दोषाचे चय प्रकोप ज्या ऋतूत होतात त्याना अनुसरून वर्ज्यावर्ज्य आहार विहार औषध सांगितले आहे.

पु., **मृत्युः, ज्वरस्य मारणात्मकत्वात् स कालो यमो नियतिर्मृत्युरित्यादिनामभिरुच्यते ।**

(सुउ. ३९.९५)

काल म्हणजे मृत्यु. ज्वर मारक म्हणून त्याला काल, यम, नियति, मृत्यु इत्यादि नावांनी ओळखतात.

**वनस्पति० व्याघ्रनखम्, सुगंधिद्रव्यविशेषः**

(रा. १२.११०)

वाघाचे नख. एक सुगंधि द्रव्य.

**कासमर्दः** (ध. ४.११८)

कासविंदा.

**चित्रकविशेषः** (रा. ६.१२७)

चित्रक प्रकार.

**रालः** (रा. १२.१७७) राळ.

न., **शारीर० कालकम्** (सुउ. १.१९)

डोळ्यातील कालक नावाचा अस्थि.

**(काला)**–स्त्री., **वनस्पति० मञ्जिष्ठा** (ध. १.१८)

एक वनस्पती. मंजिष्ठा.

**त्रिवृत् श्यामा** (ध. १.२४३) काळे तेड.

**नीलिनी** (ध. १.२३२;) (असंउ. २६)

काळा दाणा.

**कालानुसारिवा, सारिवा** (सुउ. ५८.१९)

काळे अनंतमूळ.

**काकोली** (चचि. ३.२५८)

काकोली, जीवनीय गणातील एक. अष्टवर्गातील एक वनस्पती.

**कासमर्दः** (सुचि. १७.१४) कासविंदा.

**अहिंस्रा** (सुसू. ३७.६) (वैशसिं.)

फड्या निवडुंग, कर्कटी.

**कटुहिंस्रा** (सुचि. १८.१३)

एक वनस्पती. लेपाकरिता उपयुक्त.

**हिंस्रा** (सुचि. १८.४६)

जटामांसी.

**ग्रहमाता** (असंउ. ४)

बालकांच्या ग्रहांची माता.

**(काली)**–स्त्री., **वनस्पति० कालिः** (ध. २.७०)

**कृष्णजीरकः** काळे जिरे.

**त्रिवृच्छ्यामा** (र. ११.१३१) काळे तेड.

**कालाञ्जनी** (रापरि. ४.४३)

एक वनस्पति० मल, आम, कृमि यांचे शोधन करणारी. काळी कपाशी.

**पोतकी** (ध.४ परि० ५) **शीतला, स्निग्धा, श्लेष्मला, वातपित्तजित्**

स्निग्ध, थंड, कफवर्धक व वातपित्तनाशक वनस्पती.

वि., **कृष्णवर्णयुक्ता** (असंशा. ४.१६)

काळ्या रंगाची.

**–कल्प**–वि., **ईषत् मृत्युसदृशम्** (सु.क. ४.४१)

थोडे मृत्यूसारखे.

**–कुष्ठ**–न., **वनस्पति० कंकुष्ठम्** (ध. ३.१४१)

एक वनस्पती, कंकुष्ठ.

**–कूट**–पु., **विष० कन्दविषभेदः** (सु. क. २.५)

एक विष, कंदविष.

न., **महाविषं कालकूटाख्यं श्रीशेन सद्य एव निपीतं तदवशिष्टं कन्दादिरूपेण जातेषु विषेष्वन्यतमं काकचञ्चुनिभं च** ( र. २९.१५ ) ( र. २९.७ )
हे महाविष आहे. श्रीशंकर हे प्याल्यानंतर शिल्लक राहिले ते कंदादि रूपाने निर्माण झाले; तेच कावळ्याच्या चोचीसारखे कालकूट.
**शुष्को जम्बीरफलरूपो वर्तुलकन्दो, घ्राणमात्रान्मृत्युदायकं तीव्रं विषं भवति** ( र. २.१५ )
सुकलेल्या ईडनिंबूच्या फळासारखा वाटोळा कंद. हुंगल्याने मरण येते असे तीव्र विष.
पु., **वनस्पति० सर्जकः** ( रा.९.२०४ ) राळ.

**–कूटक**–पु., **वनस्पति० कारस्करः** ( रा. परि. ९.३५ )
एक वनस्पती. कुचला, काजरा.

**–घातिन्**–वि., **विषप्रकारः, विषस्य उपयोगादिवसादन्यो दिवसपक्षमासादि कालः तस्मिन् हन्तुं शीलम् अस्येति कालघाति** ( विषम् ) ( सु.क. २.११ )
एक विष प्रकार. ते विष घेतल्यानंतर ठराविक कालाने मारणारे विष.

**–चक्र**–न., **निमेषादियुगपर्यन्तः कालश्चक्रवत् परिवर्तमानः कालचक्रमुच्यते** ( सुसू. ६.९ )
निमेषकालापासून युगकालापर्यंतचा काल. नित्य चाकासारखा फिरणारा. पुनःपुन्हा येणारा. ऋतु पुनःपुन्हा येतात. हे ऋतुकालचक्र होय.

**–चोदित**–वि., **कालप्रेरितावसानः, मुमूर्षुः** ( चइं. ११.१९ )
योग्य काली मृत्यु. कालमृत्यु. मरू इच्छिणारा.

**–च्छिद्र**–न., **कालरहितः कश्चिदवकाशः** ( चशा. ६.२८ )
कालाशिवायचा अवकाश.

**–ज**–वि., **काले जातम्** ( चचि. १. ( २ ) ४. )
योग्य वेळी झालेले.

**–जात**–वि., **स्वकाले संजातम्** ( चक. १.१० )
स्वतःच्या वेळी झालेले.

**–ताल**–पु., **वनस्पति० तमाल** ( रा.परि. ९.१५ )
एक वनस्पती. तमालपत्र, काळा खैर, ताड.

**–त्रिक**–न., **शीतोष्णवर्षालक्षणस्त्रिविधः कालः** ( चचि. २४.६८ )
शीतकाल, उष्णकाल, व पावसाळा हे तीन काळ.

**–दंष्ट्रा**–स्त्री., **मृत्युः** ( असंसू. ९.१३६ )
मृत्यु; मरण.

**–नियत**–वि., **कालेन निश्चितम्** ( असंसू ९. १११–११२ )
काळाने निश्चित झालेले.

**–निर्यास**–पु., **वनस्पति० गुग्गुलुः** ( ध. ३.१२७ )
गुग्गुळ.

**–पक्व**–वि., **कालेन पक्वः आसन्नमृत्युत्वात्पूर्णकालः** ( चइ. २.२२ ) ( असंशा. ९.१७ )
काळाने परिपक्व झालेले. मृत्यु येऊन ठेपल्यामुळे पूर्ण मृत्युघटका भरलेले.

**–पत्रका**–स्त्री., **वनस्पति० पत्रविषविशेषः** ( असंउ. ४० )
विषारी पानांचा प्रकार.

**–( पत्रिका )**–स्त्री., **वनस्पति० पत्रविषम्** ( इंदु. असंउ.४० )
विषारी पान.

**–परिहीत**–वि., **कालसंबद्धः** ( चसू. ६.५ )
काळाशी संबद्ध.

**–परिणाम**–पु., **कालेन परिणमनम् । तत्र वर्षास्वोषधयस्तरुण्योऽल्पवीर्यास्ता एव कालपरिणामात् परिणतवीर्या बलवत्यो भवन्ति हेमन्ते** ( सुसू. ६.११. चशा.४.२७ )
काळाने रूपांतर होणे. पक्व होणे. औषधि वर्षाऋतूत कोवळ्या व अल्प वीर्याच्या असतात. त्याच काळाने पक्व होत गेल्या की वीर्य वाढत जाते. त्या हेमंत ऋतूत वीर्य पूर्ण वाढलेल्या बलवान अशा होतात.

**–पालक**–न., **वनस्पति० कङ्कुष्ठम्** ( ध. ३.१४१ ) कंकुष्ठ.

**–पाश**–पु., **कालस्य नाम मृत्योः पाशः** ( चइ. ११.१६ )
मृत्यूचा फास, यमाचा फास.

**–पिपीलिका**–स्त्री., **कीट० कृष्णवर्णपिपीलिकाभेदः, मर्कोटः** ( अहचि. १५ ) **उदररोगे अन्त्रसंधानार्थमुपयुज्यते** ( सुचि. १४.१७ ) **द्र० 'पिपीलिका'.**
एक किडा. काळ्या वर्णाची मुंगी, मुंगळा. उदर रोगात चिरलेले आंत्र शिवण्याकरिता यांचा उपयोग करतात. पहा 'पिपीलिका'

**–पुच्छ**–पु., **पशु० हरिणभेदः, तस्य मांसरसो जीर्णज्वरे हितः** ( चचि. ३.१९० )

हरिणाचा प्रकार. काळ्या शेपटीचा. याचा मांसरस जीर्णज्वरात हितकर.

**–पुच्छक**–पु., पशु० **ललत्कृष्णपुच्छः कूलचरमृगः, हरिणभेदः** ( सुसू. ४६.९४. चशा. ८.२४. चसू. २७.४६ )

एक हरिणाचा प्रकार. सतत हलत्या काळ्या शेपटीचा व नदीकाठी चरणारा हरिण.

**–पुष्प**–पु., वनस्पति० **धत्तूरः** ( रा. १०.१२ )

एक धोत्रा. काळा धोत्रा.

**–पेशिका**–स्त्री., वनस्पति० **जीरकभेदः, कृष्णजीरकः** ( ध. २.७० ) द्र० ' जीरक. '

जिऱ्याचा प्रकार. काळे जिरे. पहा, ' जीरक. '

**–प्रकर्ष**–पु., **कालपरिणामः** ( चचि. १.२२ ) ( २ ) ( सुनि. ८.८ )

काळाचा परिणाम होणे. काळ वाढणे.

**–प्रकृति**–स्त्री., **कालस्वभावः, कालस्वभावसंबद्धो दोषः** ( चवि. ३.४८ )

काळाचा स्वभाव. काळाच्या स्वभावाशी संबद्ध दोष.

**गर्भोत्पत्तिकाले विद्यमानं कालरूपं कारणम् । यथा कालस्वभावस्तथैव गर्भशरीरं भवति** ( चवि. ८.९५ )

गर्भोत्पत्तीच्या वेळी असलेल्या काळाच्या गुणांचा परिणाम गर्भावर होतो म्हणून तो कारण आहे. त्या काळाचा जसा स्वभाव असतो तसेच गर्भाचे शरीर होते.

**–प्रतीक्षण**–न., **कालप्रतीक्षा** ( चसू. १३.७७ )

काळाची प्रतीक्षा. काळाची वाट पाहणे.

**–प्रियकरी**–स्त्री., वनस्पति० **अश्वगन्धा** ( रा. ४.४०२ )

एक वनस्पती. आस्कंद.

**–बलप्रवृत्त**–वि., **शीतोष्णवातवर्षाप्रभृतिनिमित्तो रोगः कालबलप्रवृत्ता–ये शीतोष्णवातवर्षाप्रभृतिनिमित्तास्तेऽपि द्विविधा व्यापन्नर्तुकृता अव्यापन्नर्तुकृताश्च** ( सुसू. २४.७ )

थंड, उष्ण, वारा, पाऊस इत्यादींमुळे झालेला रोग. प्रकार २ विकृत ऋतूंमुळे व स्वाभाविक ऋतूंमुळे होणारा.

**–वस्ति**–( परिव० ) पु., **बस्तिप्रयोगः, अत्र षोडश संख्याका बस्तयो दीयन्ते । प्रथमः स्नेहबस्तिः, ततः निरूहषट्केनान्तरीकृताः षट् स्नेहाः इति क्रमेण द्वादश, अन्ते च त्रयः स्नेहबस्तय एवं षोडश** ( चसि. १.४८ )

**पञ्चदशसंख्याकाः बस्तयः, एकः पूर्वं स्नेहः, अन्ते त्रयः स्नेहाः तथा षट् स्नेहाः पञ्चभिर्निरूहबस्तिभिरन्तरिताः** ( अरु अहृसू. १९.६४ )

ठराविक कालाने क्रमाने संख्येने बस्तींचा पुरा कार्यक्रम. हा बस्ति प्रयोग सोळांचा असतो. प्रथम स्नेह बस्ति, नंतर एक निरुह व एक स्नेह असे बारा बस्ति. शेवटी तीन स्नेहबस्ति. दुसरा प्रयोग १५ चा; प्रथम स्नेह नंतर स्नेह व निरुह असे क्रमाने अकरा व शेवटी ३ स्नेहबस्ति.

**–भोजन**–न., **युक्ते काले भोजनम् । आरोग्यकराणां श्रेष्ठं भवति** ( चसू. २५.४० )

योग्य काली नियमितपणे जेवण. आरोग्य राखणाऱ्या सर्व उपायात श्रेष्ठ.

**–मल्ल**–पु., वनस्पति० **अर्जक** ( चचि. ३.२६७ ) **( जज्जटः )**

अजवलाप्रकार. पांढरा अजवला.

**–मल्लिका**–स्त्री., वनस्पति० **अर्जक** ( चचि. ३.२६७ ) **( जज्जटः )**

अजवल्याचा प्रकार. पांढरा अजवला.

**–माल**–पु., वनस्पति० **अर्जकः** ( चचि. ३.२६७ ) ( ध. ४.५६ )

**कृष्णार्जकः कृष्णमल्लिका, ' बर्बरिका इति लोके '** ( ड. सुसू. ३८.१८ )

आजवला, अजवल्याचा प्रकार; काळा अजवला. बर्बरिका.

**–( मालक )**–पु., वनस्पति० **अर्जकः कृष्णपत्रा क्षुद्रतुलसी** ( चक १.२५ ) ( चवि. ८.१४२ )

काळी तुळस. लहान पानाची काळी तुळस.

**–( माला )**–स्त्री., वनस्पति० **अर्जकः, तुलसीभेदः** ( सुसू . ४६,२२१ ) ( अहृसू. १५.३० ) ( असंसू. १६.२४ )

एक वनस्पती. तुळशीचा प्रकार.

**–( मालिका )**–स्त्री., वनस्पति० **अर्जकः, कृष्णकुठेरकः कृष्णार्जकः** ( असंसू. ७.१५७ )

काळा अजवला. काळी तुळस.

**–माषी**–स्त्री., वनस्पति० **बाकुची** ( रा. ४.२२७ )

वनस्पती. बावची.

**–मुष्कक**–पु., **वनस्पति० मुष्ककः** ( असंसू. ३९.७ ) ( अहृसू. ३०.८ ) मोखाडा.

**–मूल**–पु., **वनस्पति० चित्रकः** ( रा. ६.१२७ ) चित्रक.

**–मृत्यु**–पु., **योग्यकाले आयुषः पूर्णत्वात् समागतो मृत्युः** ( चवि. ३.३७ )
वृद्धापकाली योग्यवेळी आयुष्य पूर्ण झाल्यावर आलेला मृत्यु.

**–मेषिका**–स्त्री., **वनस्पति० मञ्जिष्ठा** ( ध. १.१८ )
मंजिष्ठ, मंजिष्ठा.

**–मेषी**–स्त्री., **वनस्पति० मञ्जिष्ठा** ( ध. १.१७ )
मंजिष्ठ, मंजिष्ठा.
**जीरकभेदः कृष्णजीरकः** ( रा. ६.१०५ )
**द्र० 'जीरक.'**
जिऱ्याचा प्रकार; काळे जिरे.
**बाकुची** ( ध. १.१६६ ) बावची.
**त्रिवृत् ( श्यामा )** ( ध. १.२४३ ) काळे तेड.

**–मेह**–पु., **रोग० पित्तजप्रमेहभेदः, पित्तस्य परिकोपेन यो मषीवर्णमुष्णमजस्रं मूत्रं प्रमेहति, तं कालमेहिनं विद्यात्** ( चनि. ४.२५ ) ( चसू. १९.४ ) ( ९ ) ( असंनि. १०.१२ )
एक रोग. पित्तज प्रमेहाचा प्रकार. पित्तप्रकोपाने काजळाप्रमाणे काळे व उष्ण नेहमी मुततो; त्याला कालमेह म्हणतात.

**–योग**–पु., **कालस्य संयोगः, शरीरवृद्धिकरभावेष्वेकः** ( चशा. ६.१२ )
अनुरूप कालाचा संयोग; शरिराची वाढ करणाऱ्या अनुकूल गोष्टींपैकी एक आहे.

**–रात्रि**–स्त्री., **मृत्युरात्रिर्यमभगिनी** ( सुनि. १०.१३ )
मृत्यूची रात्र. काळ रात्र. यमाची बहीण.
**रेवतीग्रह० जातहारिणी** ( का. रेवतीकल्प. ३८ )
रेवती ग्रहांपैकी एक. बालक जन्मल्याबरोबर मारणारी.

**–लवण**–न., **लवण० बिडलवणम्** ( चचि. १३.१३४ )
एक मीठ. बिडलवण. बिडलोण.
**सौवर्चलम्** ( सुउ. ४२.९२ )
पादेलोण.

**–लोह**–न., **खनिज० तीक्ष्णलोहम, कृष्णायसम्** ( ध. ६.२८; र. २५.६७; चचि. १७.१२९ )
खाणीतले पोलाद, काळे लोखंड.

**–लोहरजस्**–न., **काललोहस्य चूर्णम्; मण्डूरम्** ( चचि. ७.१७१; चसू. २१.२३ )
काळ्या लोखंडाचे चूर्ण; पोलादाचे चूर्ण; मंडूर.

**–वित्**–वि., **कालज्ञः** ( असंसू. ५ )
काल जाणणारा. कालज्ञाता.

**–विध्वंसनरस**– पु., **पारदयोग० सुवर्णरौप्यताम्र-धत्तूरादियुक्तः पाण्डुनाशनः** ( र. १९.४९-५७ )
पाऱ्याचा एक योग. सोने, रूपे, तांबे, धोत्रा इत्यादी युक्त योग. पांडुरोगनाशक.

**–विनिश्चय**–पु., **कालविचारः** ( ४३.१० )
काळाचा विचार. काळाचा निश्चय.

**–विपर्यय**–पु., **विषमकालः, कालदुष्टिः** ( चसू. २८.७ )
विषमकाल. काळाची दुष्टि. विपरीत काळ. स्वाभाविक काळाच्या उलट काळ.

**–विभाग**–पु., **ऋत्वादिरूपः कालभेदः** ( सूचि. ३.१२ )
काळाचा विभाग. ऋतु महिना इत्यादी विभाग.

**–वृन्त**–पु.. **वनस्पति० पाटला** ( असंसू. १४.३ )
पाडळ.

**–वृन्तिका**–स्त्री., **वनस्पति० पाटला** ( ध. १.१२० )
पाडळ.

**–वेदिन्**–वि., **रोगिणोऽन्यस्य चाऽवस्थास्वभावविशेषानुमितं कालं ज्ञातुं शीलमस्येति कालवेदी** ( असंसू. २.९ )
रोग्याच्या रोगाच्या अवस्था व स्वभावविशेष यांवरून ठरणारा काल जाणण्याची योग्यता असलेला.

**–वैकृत**–न., **कालस्य विकृतत्वं विषमत्वं वा यथा प्राप्तत्वाद्विपरीतस्वरूपम्** ( असंसू. ९.८६ )
योग्य कालात विकृति होणे, काल विषम होणे. स्वाभाविक काळाच्या विपरीत स्वरूप असणे.

**–शाक**–न., **शाक० श्राद्धार्हं कालियाशाकम् । गुणाः– कटु, शीतवीर्यं, दीपनं, रक्तं, पित्तकफहरं, वातकृत्, सरं, रुच्यं, मेध्यं, बल्यं, गरशोफजित्** ( चसू. २७.९१; सुसू. ४६.२७२; ) ( भाप्र., ) **चुंचुशाकमित्येके, कैडर्यपत्रमिति केरलेषु केचित् । कलंबभेदः, नाडीकशाकं द्विविधं तिक्तं मधुरमेव च** ( अहकोष )
हिं.–नाडिकाशाक, नरिचा.
बं.–नलितपाट्ट.
**म.–कुळीची भाजी, नाडीशाक.**
गु.–करली.

श्राद्धाकरिता ही भाजी उपयुक्त. **गुण**-तिखट, थंड, दीपक, रक्तस्राव, पित्तकफहर, वातकर, सारक, विष, सूज नाहीशी करणारी, रुचकर, बलदायक, व बुद्धिवर्धक. कांही चुंचु कळंबाचा प्रकार म्हणतात व केरळात कैडर्यपत्र समजतात.

**-शालि**-पु., **कृष्णशालि, द्र० 'शालि'** ( रा. १६.८६ )
काळी साळ;

**-शेय**-न., **आहारद्रव्य० तक्रम्** ( असंचि. १० )
आहारातील पदार्थ. ताक.

**-षट्क**-न., **रात्रिदिवसयोः षड्भागाः ते च पूर्वाह्ण-मध्यान्हाऽपराह्ण-प्रदोषाऽर्धरात्रप्रत्यूषाः इति** ( सुउ. ३९.६२ )
दिवसरात्रीचे सहा भाग. सकाळ, दुपार, मावळती, प्रदोष, अर्धरात्र व पहाट असे चार चार तासांचे सहा भाग.

**-संपत्**-न., **कालस्य अनतितीक्ष्णत्वादिरूपा संपत् ( गुणवत्त्वम् )** ( चशा. २.६ )
तीक्ष्ण, उष्ण, शीत, आर्द्र इत्यादी गुण फार तीव्र नसणे. सहन होणारे ऋतु असणे. गुणवान् ऋतु असणे, गुण हीच काळाची संपत्.

**-संप्राप्ति**-स्त्री., **संप्राप्तिभेदः, सङ्ख्या-प्राधान्य-विधिविकल्प-बल-कालविशेषैर्भिद्यमाना संप्राप्तिः । द्र० 'संप्राप्ति'** ( च. १.१२ (१) )
संप्राप्तीचा एक प्रकार. संख्या प्राधान्य इत्यादी संप्राप्तीच्या प्रकारांपैकी एक.

**-स्कन्ध**-पु., **वनस्पति० विट्खदिरः खदिरभेदः, द्र० 'खदिर'** ( र. ८.१८ )
खैराचा प्रकार. शेण्या खैर.
**तमालः** ( सुसू. ३८.८ ) तमाल.
**तिन्दुकः** ( ध. ५.४० ) टेंभुरणी.
**उदुम्बरः** ( रा. ११.१३६ ) उंबर.

**-स्फोट**-पु., **रोग० तस्य चिकित्सा-पुत्रजीवस्य मज्जां तु जलैः पिष्ट्वा प्रलेपनात् । कालस्फोटं विषस्फोटं सद्यो हन्यात्सवेदनम् ।** ( र. २४.१२९ )
एक रोग, काळेफोड, **चिकित्सा**-पुत्रजीवकाच्या फळाच्या बीचा गर घेऊन पाण्यातून लावावा. विषाने झालेले फोडही कमी होतात. वेदना थांबतात.

**-स्वभाव**-पु., **कालस्य स्वभावः, अनेन च ग्रीष्मे कृताभ्यां देहाऽऽहारयोर्लघुरूक्षत्वाभ्यां चीयमानोऽपि लघुः रूक्षो वायुर्न कुप्यति उष्णेन प्रतिबद्धत्वात् । वर्षाकाले जायमानाम्लविपाकेनाहारेण चीयमान-मप्यविपाकं पित्तं न कुप्यति शीतेन प्रतिबद्धत्वात् । शिशिरे देहे आहारे च संजाताभ्यां स्निग्धशीताभ्यां प्रकृत्या स्निग्धशीतोऽपि श्लेष्मा चीयते, न तु कुप्यति शीतेन घृतवद् घनीभूतत्वात् ।** ( अहसू. १२.२५-२८ )
कालाचा स्वभाव. ग्रीष्म ऋतूत रूक्ष व लघु आहाराने व देहही रूक्ष लघु असल्याने वाताचा चय होतो, परंतु उष्णता खूप असल्याने प्रकोपाला अडथळा होतो; त्याचा प्रकोप होऊं शकत नाही. वर्षाऋतूत आहाराच्या व कालस्वभावाने अम्लविपाकी पित्त संचित होते, पण कालाच्या शीतगुणाने त्याचा प्रकोप होत नाही. शीतत्वप्रतिबंधक आहे. शिशिरात शरीर व आहार स्निग्ध व शीतत्वामुळे कफ संचित होतो, पण थंडीने प्रकोप होत नाही. तो घट्ट होतो. हा कालस्वभाव.

**-स्वभावमार्ग**-पु., **कालस्य स्वाभाविको मार्गः । आदानकाले निसर्गकाले वा सूर्यस्य मकरकर्क-राशिमध्ये भ्रमणम्** ( असंसू. ४.६ )
कालस्वभावानुरूप मार्ग. आदान कालारंभी मकर व विसर्गकालारंभी कर्क राशीत सूर्याचे भ्रमण होते. कालाचा स्वाभाविक मार्ग.

**कालक**-पु., **कृष्णवर्णः** ( सुनि. १३.४३ ) काळा वर्ण.
**धान्य०**, ( सुसू. २०.५ ) एक धान्य.
**सर्प०** ( असंसू. ७.७६ ) एक सर्प.
न., **शारीर०, नेत्रगतं कालकास्थि** ( सु. उ. १.१९ )
शारीर विभाग. डोळ्यांतील कालक अस्थि.

**-चूर्ण**-न., **योग० पाठा, व्योषम्, रसाञ्जनं त्रिफला, लोध्रं, चित्रकः, इत्येभिर्युक्तः दन्तास्यगलरोगेषु गण्डूषधारणार्थमुपयुज्यते** ( चचि. २६.१९४-१९५ )
पहाडमूळ, सुंठ, मिरी, पिंपळी, रसांजन, त्रिफळा, लोध्र, चित्रक, यांचा एक औषधीयोग. दांत, तोंड, गळा, यांच्या रोगात गुळण्या-चूळ धरण्याकरिता उपयुक्त.

**कालङ्कतक**-पु., **वनस्पति० कासमर्दः** ( चक. १.२५ )
कासविंदा.

**कालङ्कत**-पु., **वनस्पति० कासमर्दः** ( चवि. ८.१३५ )
कासविंदा.

**कालाकालसंज्ञा**–स्त्री., **आतुरावस्थासु तु कालाकाल-संज्ञा। तद्यथा–अस्यामवस्थायामस्यौषधस्य कालोऽकालो वा** ( असंसू. २३.१२ )
विकारावस्थेत कालाकाल दोन्ही असतात. या अवस्थेत या औषधाचा काल आहे, या औषधाचा काल नाही असे म्हणणे.

**कालागरु**–न., **वनस्पति० अगरु-भेदः कृष्णागरु, द्र० 'अगरु'** ( रा. १२.४० )
एक वनस्पती. अगरूचा प्रकार. काळा अगरू. पहा 'अगरु'

**कालाञ्जन**–न., **अञ्जनम्, सौवीराञ्जनम्** ( सुउ. ४५.३२ ड. )
अंजन, सुरमा, काळा सुरमा. सौवीर नावाचे अंजन.

**कालाञ्जनी**–स्त्री., **वनस्पति० गुणाः–कटुः, उष्णा, मलामकृमिशोधनी, अपानावर्तशमनी जठरामय-हारिणी च** ( रापरि. ४.४३ )
एक वनस्पती. **गुण**–तिखट, उष्ण, मळ, आम, कृमि यांचे शोधन करणारी; अपान वायु ऊर्ध्व झाल्यास त्याचे व उदराचे शमन करणारी. काळी कपाशी.

**कालानुवर्तिन्**–वि., कालपराधीनः ( चसू. २७.१९७ )
कालाला अनुसरणारा. काळाच्या आधीन. काल-पराधीन.

**कालानुसारक**–न., **वनस्पति० तगरम्** ( रा. १०.१०३ )
तगर. पिवळा चंदन.

**कालानुसारिन्**–पु., **वनस्पति० तगरम्** ( सुचि. ३.६० ) तगर.

**कालानुसारिवा**–स्त्री., **वनस्पति० सारिवाभेदः, कृष्ण-सारिवा, द्र० 'सारिवा.'** ( सुउ. ५८.६५, सुचि. २२.६९ )
अनंतमूळ प्रकार. काळे अनंतमूळ, काळी सारिवा, पहा 'सारिवा.'
**तगरभेदः** ( सुक. ६.१७ ) तगराचा प्रकार.

**कालानुसारी**–स्त्री., **वनस्पति० कृष्णसारिवा, द्र० 'सारिवा'**, ( सुचि. २०.५५ )
काळी सारिवा. काळे अनंतमूळ. पहा 'सारिवा.'

**कालानुसार्य**–न., **तगरम् ( जज्जटः )** ( चचि. ३.२५८ ) **शैलजम् इति केचित** ( सुसू. ३७.२६ ) **( शैलजम्=शैलेयम् ) चन्दनभेदः** ( चचि. ३. २५८. ( चक्र )
तगर. दगडफूल. चंदनाचा एक प्रकार. पिवळा चंदन, शिसव, शिलाजित.

**कालानुसार्यक**–न., **खनिज० शैलेयम्** ( ध. ३.७३ )
शिलाजित.

**कालानुसार्या**–स्त्री., **कालानुसारिवा** ( सुक. ५.६५–६८ )
पहा 'कालानुसारिवा.'
**तगरम्** ( सुचि. १७.१५ ) तगर.
**चन्दनभेदः, द्र० 'चन्दन'** ( चचि. ४.१०३ )
पिवळा चंदन. पहा 'चंदन.'

**कालानुसार्यादितैल**–न., **योग० कालानुसारी, अगुरु, एला, जाती, चन्दनम्, पद्मकम्, शिला, दारु, अमृता, तुत्थम् एतैः सिद्धं तैलं रोपणार्थं युज्यते** ( असंउ. ३१. तप्रपृ. २९८ )
एक सिद्ध तेल. अनंतमूळ, अगरु, वेलची, जाई, चंदन, पद्मकाष्ठ, मनशीळ, दारुहळद, गुळवेल, मोरचूद, यांनी सिद्ध तेल व्रण रुजवण्याकरिता उपयुक्त.

**कालान्तरप्राणहर**–वि., **मर्मप्रकार० कालान्तरप्राणहराणि पक्षान्मासान्मारयन्ति, तेष्वपि तु क्षिप्राणि कदाचिदाशु मारयन्ति** ( सुशा. ६.२३ ) **द्र० 'मर्म'**
आघातानंतर कालान्तराने आठवड्यानंतर मरण ओढवेल असे मर्म. पंधरा दिवसांनी महिन्याने मरण. त्यातही क्षिप्रमर्मावर आघात झाला तर लवकर मरण.

**कालान्ध**–वि., **कालेन आसन्नतरमृत्युनाऽन्धत्वं प्राप्तः** ( चइं. ११.१८ )
कालाने झालेला अंध. मरणाच्या वेळी अंधत्व येणे.

**कालापेक्ष**–पु., **ऋत्वहोरात्रवयोव्याधिभोजनेषु प्रत्येकं क्रियमाणो भेदः तं तं कालं अपेक्षते इति कालापेक्षः** ( चचि. ३०.३०८ ) **द्र० 'काल'**.
कालाला अनुसरुन ऋतु, दिवस, रात्र, वय, व्याधि, भोजन, या प्रत्येकात केलेला भेद. त्या त्या कालाची अपेक्षा. पहा 'काल'.

**कालाभ्रक**–न., **खनिज० कृष्णाभ्रकम्** ( र. २०.११ ) **द्र० 'अभ्रक'**
खाणीतले काळे अभ्रक. पहा 'अभ्रक'

**कालाम्ल**–वि., **कालेन अम्लम्** ( अहृसू. ५.७८ )
काळाने झालेले अम्ल.

**कालायक**–न., वनस्पति० दारुहरिद्रा ( ध. १.५८ )
दारुहळद.

**कालायशाक**–न., शाक० त्रिपुटक–कलायस्य पत्राणि शाकत्वेनोपयुज्यंते, **गुणाः**–भेदनं मधुरं रूक्षमतिवातलं च ( सुसू. ४६–२७७ )
वाटाण्याच्या पानांची भाजी. तीन पुड्याचा जो वाटाणा त्याच्या पानांची भाजी. **गुण**–मधुर, रूक्ष, मळ फोडणारी, अतिवातल.

**कालायस**–न., खनिज० लोहभेदः, कृष्णलोहः, द्र० 'लोह' ( चचि. १.५८ )
लोखंडाचा प्रकार. काळे लोखंड.

**कालि**–पु., वनस्पति० धत्तूरः ( ध. ४.७ ) धोत्रा.
स्त्री., जीरकभेदः, कृष्णजीरकः ( ध. २.७० )
द्र० 'जीरक'
जिऱ्याचा प्रकार, काळे जिरे.

**कालिका**–स्त्री., वनस्पति० काकोली ( रा. ३.१६६ )
'काकोली' जीवनीयगणातील एक.
कर्कटशृङ्गी ( रा. ६.१११ ) काकडशिंगी.
कालीयकम् ( सुउ. ५१.२३ ) वनस्पती. कृष्णागरू.
जीरकभेदः ( स्थूल ) जीरकः ( ध. २.५९ )
द्र० 'जीरक'
जिऱ्याचा प्रकार. मोठे जिरे.
खण्डः ( र. १७.१३७ ) चूर्ण.
कर्णगतदैवकृतछिद्रसमीपवर्तिनी कृष्णवर्णा सिरा ( सुसू. १६.५ )
शारीर अवयव. कानाच्या पाळीमध्ये दैवकृत छिद्राच्या जवळ असणारी कृष्णवर्णाची शिरा.

**कालिङ्ग**–पु., वनस्पति० इन्द्रयवः ( र. १०.९७ )
इंद्रजव.
फल० कलिङ्गः ( र. ३०.६३ )
एक फळ. कलिंगड, टरबूज.
कलिङ्गडम् ( अहसू. ६.८७ ) कलिंगड.

**–मान**–न., मान० कलिङ्गदेशे भवं मानम् । मानं च द्विविधं, कालिङ्गं मागधं च, कालिङ्गान्मागधं श्रेष्ठमिति कथ्यते ( चक. १२.१०५ )
कलिंग देशात चालणारी प्रणाली. दोन प्रकारचे मोजमाप. कालिंग व मागध ( मगध देशातले. ) दुसरे श्रेष्ठ.

**कालिनी**–स्त्री., रसबन्धनप्रयोगयोग्या स्त्री । तस्या लक्षणम्–श्यामवर्णा, पद्मलोचना, कुञ्चितकेशी, सुरूपा, तरुणी, विस्तीर्णजघना, शुभा, पीनस्तनभारेण नम्रिता, चुम्बनालिङ्गनस्पर्शकोमला, मृदुभाषिणी, अश्वत्थपत्रसदृशयोनिदेशसुशोभिता, कृष्णपक्षे पुष्पवती च या नारी सा 'कालिनी' इति कथ्यते । रसायने, रसबन्धप्रयोगे च उत्तमा स्मृता ( र. ६.३३ )
पाऱ्याच्या बंधनाचा प्रयोग करण्याला योग्य स्त्री. **लक्षण**–श्यामवर्ण, कमळाप्रमाणे डोळे, कुरळे केस, सुस्वरूप, तारुण्याने युक्त, मांड्या पुष्ट व पसरट, पुष्ट स्तनाच्या भाराने लवलेली, चुंबन, आलिंगन, यांना कोमल स्पर्श असलेली, मृदु भाषण करणारी, पिंपळाच्या पानासारखा योनीचा भाग सुशोभित, वद्य पक्षात विटाळशी वसणारी स्त्री. कालिनी. रसायनालाही उपयुक्त.

**कालिन्द**–न., फलशाक०, कृष्णबीजं कूष्माण्डसदृशं फलम् ; कलिन्द इति लोके । तद्गुणाः–दृष्टिशुक्रक्षयकरं कफवातकृच्च ( सुसू. ४६.२१४ )
फळभाजी. काळ्या बियांचे कोहळ्यासारखे फळ. कलिंगड. **गुण**–दृष्टि व शुक्र यांचा क्षय करणारे; कफवातवर्धक.

**कालिन्दक**–पु., वनस्पति० जोन्नालः, कूष्माडभेदः ( सुसू. ९.४ ) द्र० 'कूष्माण्ड'
कोहळ्याचा प्रकार, कलिंगड,

**कालिन्दी**–स्त्री., वनस्पति० कटभी ( रापरि. ९.३८ )
मालकांगोणी. विष्णुक्रांता.
त्रिवृत् ( ध. १.२४३ ) तेड.

**–रक्ता**–त्रिवृत् श्यामाभेदः रक्ताकालिन्दी ( रा. ६.३६९ ) द्र० 'त्रिवृत्'
काळे तेड प्रकार. तांबडे तेड. पहा 'त्रिवृत्'.

**कालीय**–न., शारीर० रक्तस्यानिलयोगात् कालीयम् ( असंशा. ५.४८ )
शारीर अवयव. रक्त व वात यांनी कालीय अवयव बनतो.
कालीयकम् ( रा. १२.१५ सुचि. २५.३९ )
कृष्णागरू.
कृष्णचन्दनम् ( सुचि. २०.३५ )
द्र० 'चन्दन' 'कालीयक'
काळे चंदन.

**कालीयक**–न., वनस्पति० दारुहरिद्रा ( रा. ६.८४ )
दारुहळद.
कृष्णचन्दनम् ( असंचि. १८ ) काळे चंदन.

मूढगर्भप्रकारः तत्र कीलः प्रतिखुरो बीजकः परिघः इति चतुर्विधो मूढगर्भो भवति ( सुनि. ८.४ ) द्र० 'मूढगर्भ' ऊर्ध्वबाहुशिरःपादः कीलवद् योनिमुखं निरुणद्धि अतः कील इत्युच्यते ( सुनि. ८.४ ) अडलेल्या गर्भाच्या चार प्रकारांपैकी एक प्रकार. हात, डोके, व पाय हे वर असलेला, योनिमुखात खिळ्यासारखा अडलेला गर्भ.

**–पादिका**–स्त्री., वनस्पति० **हंसपादी** ( रा. ५.१६७ ) लाल लाजाळू.

**कीलता**–स्त्री., वनस्पति० **कुसुम्भः** ( ध. ६.११८ ) कर्डई.

**कीलाट**–पु., किलाटः ( इंदुः, असंसू. ६.७८ ) खरवस.

**कीलाल**–न., जलम् ( ध. ६.३०२ ) पाणी, रक्त.

**कीशरोमा**–स्त्री., वनस्पति० **कपिकच्छुः** ( रा. ३.२२ ) खाजकुहिली.

**कु**–स्त्री., **पृथ्वी** ( र. २०.२२२ ) पृथ्वी.

**भैषज्य० कांक्षी, सौराष्ट्री** ( र. २०.२२२ ) एक औषध. तुरटी. फटकडी.

**कृष्णमृत्तिका** ( र. २०.२२२ ) काळीमाती.

अव्य०, **कुत्सितम्, निन्द्यम्, अल्पम् वा** वाईट, तिरस्करणीय, किंवा थोडे.

**–कुण्ड**–पु., **वनस्पति० कूष्माण्ड** ( असंसू. ७.१४१ ) कोहळा.

**–चन्दन**–न., **चन्दनवृक्ष०, रक्तचन्दनं सालसारादिगणे एकं द्रव्यम्** ( सुसू. ३८.८ ) **रक्तपित्ते प्रलेपार्थमुपयुक्तम्** ( चचि. ४.१०३ ) **पित्तसंशमनवर्गे** ( सुसू. ३९.८ ) **पटोलादिगणे** ( सुसू. ३८.३३ ) **मलयाद्रिचन्दनम्–प्रियङ्ग्वादिगणे** ( सुसू. ३८.४५ ) **गुणाः–स्वादु, शीतवीर्यं, तिक्तं, सुगन्धि, व्रणरोपणं, पित्तकफापहं, वर्ण्यम्** ( ध. ३.७; ) **वातपित्तज्वरघ्नं च विस्फोटोन्मादभूतहृत्** ( रा. १२.१४ )

म.—**रक्तचंदन, लालचंदन.**

गु.—बडीगुंची, हतीगुंची.

बं.—रक्तकम्बुल, रञ्जन.

त.—मंजदी, अनेगुण्डुमनी.

रक्तचंदनाचा वृक्ष. सालसारादि गण. पित्तसंशमनवर्ग, पटोलादि गण यांतील एक द्रव्य. रक्तपित्तविकारातील स्रावात लेपाकरिता. मलय पर्वतातील चंदन. प्रियंग्वादि गणात आहे. **गुण**–गोड, कडु, थंड, पित्तकफनाशक, सुगंधि, व्रणरोपण व वर्ण चांगला करणारा, वातपित्तज्वरनाशक, फोड उन्माद व भूतबाधानाशक.

**–चेला**–स्त्री., शाक० **अकर्णविद्धिकाभेदः । तिक्ता, कटुपाकिनी, शीता, कफपित्तहरा च** ( चसू. २७.९५ ) एक भाजी. कडु, पचनानंतर तिखट, शीत, कफपित्तनाशक. पहाडमूळ.

**–चैला**–स्त्री., **वनस्पति० पाठा** ( अरुअहसू. ६.७७ ) पहाडमूळ.

कृष्णपाठा ( हे. अहसू. ६.७७ ) काळे पहाडमूळ.

**–तित्तिर**–पु., **पक्षि०, विष्किरेष्वेकः, तित्तिरभेदः, पाण्डुः कपिलः द्र० 'विष्किर;'** ( सुसू. ४६.५९ ) कवडा. उकरून भक्ष्य खाणारा पक्षी. पांढरा किंवा पिंगट रंगाचा.

**–तिली**–स्त्री., **सूक्ष्मतिलजातिः कुन्तिली इति** ( हे० ) **चञ्चुसदृशीदीर्घपत्रा, तिक्ता, कटु पाकी, शीता, ग्राहिणी, वातला, कफपित्तजिच्च** ( अहसू. ६.७६ ) लहान तिळाची एक जात. मोठ्या चोचीसारखी लांब पानाची. **गुण**–कडु, पचल्यानंतर तिखट, थंड, मळ बांधणारी, वातवर्धक, कफपित्त जिंकणारी.

**–तुम्बक**–पु., शाक० **द्रोणपुष्पिका, फञ्जीचिल्ल्यादिगणे** ( चसू. २७.९८ ) **पत्रशाकमिदम् । स्वादुपाकरसः, शीतः, कफघ्नो, नातिपित्तलः, लवणानुरसो, रूक्षः, सक्षारो, वातलः, सरश्च** ( सुसू. ४६.२७४ ) एक पालेभाजी. द्रोणपुष्पी, फंजी, चिल्ली इत्यादि भाज्यांच्या गणातील एक. **गुण**–पचल्यानंतर व मूळची गोड, मागाहून खारट, थंड, कफनाशक, थोडी पित्तकर, क्षारयुक्त, रूक्ष, वातवर्धक, सारक.

**–तृण**–न., **वनस्पति० रोहिषं तृणम्, कत्तृणम्** ( रा. ८.१०६ ) रोहिस गवत.

**–धान्य**–न., **कुत्सितं धान्यम्, कुधान्यवर्गः–कोरदूषकश्यामाकनीवारशान्तनुवरकोद्दालकप्रियङ्गुमधूलिकानान्दीमुखीकुरुविन्दगवेधुकसरबरूकतोद (य)पर्णीमुकुन्दकवेणुयवप्रभृतयः कुधान्यविशेषाः । प्रभृतिग्रहणेन झण्टी घर्मेटीजोन्नलिकादयः ग्राह्याः** ( सुसू. ४६.२१ ) **तद्गुणाः कषायमधुराः कटुविपाकिनो रूक्षा उष्णा बद्धनिस्यन्दा वातपित्तप्रकोपणाः श्लेष्मघ्नाश्च** ( सुसू. ४६.२२ )

हलके धान्य. कोरदूषक, श्यामाक, नीवार इ. नावाचे पौष्टिक गुण नसलेले धान्य. **गुण**–तुरट, गोड, पचल्यानंतर तिखट, रुक्ष, उष्ण, स्राव थांबवणारे, वातपित्तप्रकोपक, कफनाशक; नावे वर आहेत.

**–नख**–पु., न., रोग० क्षुद्ररोगः ( सुनि. १३.२२ ) **अभिघातात् प्रदुष्टो यो नखो रूक्षोऽसितः खरः भवेत्तं कुनखं विद्यात् । कुलीनमिति अपरा तस्य संज्ञा । अस्थिप्रदोषजो विकारोऽयम्** ( सुसू. २४.९ ) **तत्र चिकित्सा–चिप्परोगवत् कुनखमुष्णाम्बुना सिक्तं दुष्टमांसमुत्कृत्य स्रावयेत्, अनन्तरं चक्रतैलेनाभ्यज्य सर्जचूर्णेन चूर्णयेत् । ततो बन्धनं बध्नीयात् यत्राऽशक्यं तत्राग्निना दहेत् मधुरौषधसिद्धेन तैलेन च रोपयेत्** ( सुचि. २०.११ )
एक रोग. आघाताने जे नख दूषित होते ते रुक्ष काळे खरखरीत होते त्याला कुनख म्हणतात. अस्थिधातूच्या दुष्टीने हा रोग होतो. **उपचार**–चिप्परोगासारखे. ऊन पाणी शिंपडून दुष्ट मांस उकरून रक्तस्राव करावा. नंतर घाण्याच्या तेलाने चोपडून राळेचे चूर्ण वर भुरभुरावे. नंतर पट्टी बांधावी. जेथे हे अशक्य तेथे अग्नीने जाळावे व मधुर औषधांनी सिद्ध केलेल्या तेलाने ती जखम रुझवून आणावी.

**–नखिन्**–वि., **कुनखरोगपीडितः** ( सुशा. २.२५ ) वाईट, कुरूप अशा नखाच्या रोगाने पीडलेला.

**–नटी**–स्त्री., खनिज० **मनःशिला** ( र. १२.१६४; ध. ३.९६ ) मनशीळ.

**–नटीघृत**–न., सिद्धघृतं० **मनःशिलाघृतम्** ( र. ३.१७१ )
मनशीळ घालून सिद्ध केलेले तूप.

**–नामन्**–न., रोग० **अर्शः** ( असंचि. १० )
मूळव्याध.

**–नीली**–स्त्री., वनस्पति० **तैरिणी** ( रापरि. ४.१५ )
अरुण–तांबुस–काळसर तांबडा रंग देणारी वनस्पती.

**–पाक**–पु., वनस्पति० **कारस्करः** ( रापरि. ९.३५ )
कुचला.

**–मार्ग**–पु., वनस्पति० **अपामार्गः** ( र. २०.२२२ )
आघाडा.
**धत्तूरः** ( र. २०.२२२ ) धोत्रा.

**–रूप्य**–न., खनिज० **वङ्गम्** ( रा० १३.१४ ) कथील.

**–वङ्ग**–न., खनिज० **सीसकम्** ( रा. १३.२० ) शिसे.

**–वज्रक**–न., खनिज० **वैक्रान्तः** ( रा. १३.५० )
तोरमल्ली.

**–वैद्य**–पु., **अनधीतशास्त्रकर्माभ्यासो वैद्यनामधारी अनिपुणो वैद्यः** ( सुशा. ६.४० )
शास्त्राचा अभ्यास व चिकित्सेचा अनुभव नसलेला, वैद्य म्हणविणारा न शिकलेला वैद्य.

**–शाल्मलि**–स्त्री., वनस्पति० **रोहितकः** ( ध. ५.१३० )
रक्तरोहिडा. पहा, 'रोहितक'.

**–शिम्बिवल्ली**–स्त्री., वनस्पति० **कपिकच्छूः** ( सुसू. ४६.४६ ) खाजकुहिली, कवचबीज.

**–शिंशपा**–स्त्री., वनस्पति० **शिंशपाभेदः** ( ध. ५. १२१ ) द्र० '**शिंशिपा**'
सिसव.

**कुकुन्दर**–पु.,न., शारीर० **स्फिचोरुपरितनौ द्वावुन्नतभागौ** ( चशा. ७.११ ) **कुमाराणां प्रशस्ताप्रशस्तलक्षणम् कुकुन्दरौ गम्भीरावलोमशौ प्रविभक्तौ समौ प्रशस्येते । लोमशौ प्रव्रज्यायै । प्रदक्षिणावर्तौ तु धन्यौ । विपुलौ दीर्घायुषाम् । श्लिष्टावनायुषाम्** ( कासू. २८.६ )
शरिराचा विभाग. ढुंगणाच्या वरचे उंचवट्याचे दोन्हीकडचे भाग. **लक्षण**–कुकुंदर हे खोल ( वरचे मांस पुष्ट असल्यामुळे ) एकमेकापासून निराळे दिसणारे, सारखे ( लहान मोठे नाही ) व केस रहित असणे उत्तम. त्यांवर केस असणारा बालक देशत्यागी किंवा संन्यास घेणारा, एकमेकांत मिसळलेले असलेला बालक अल्पायुषी. कुकुंदर मोठे असणे दीर्घायुष्य दर्शक व उजवे भोवरे असणे श्रीमंतीचे दर्शक.
**मर्म० द्वे मर्मणी, पार्श्वजघनबहिर्भागे पृष्ठवंशमुभयतः नातिनिम्ने कुकुन्दरे नाम । तत्र विद्धे सति स्पर्शाज्ञानम् । अधःकाये चेष्टोपघातश्च । संधिमर्मणी अर्धाङ्गुले वैकल्यकरे च** ( सुशा. ६.२६ )
एक मर्म. ही दोन मर्मे. जांघेच्या बाहेरच्या पाठीमागच्या पृष्ठवंशाच्या दोन्ही बाजूला किंचित् खोलगट मर्म. तेथे आघात होऊन फुटले तर स्पर्श कळत नाही व खालच्या अवयवांच्या, पायांच्या हालचाली बंद होतात. हे संधिमर्म आहे. अर्धांगुळाइतके, गात्र विकल करणारे.

**कुकूण**–पु., नेत्ररोग० **कुकूणकः** ( असंउ. २ )
डोळ्यांचा एक रोग, पहा 'कुकूणक'.

**कुकूणक**–पु., नेत्ररोग० **बालानाम् अक्षिवर्त्मभवो नेत्ररोगः अनन्नभोजिनो बालस्य स्तन्यदोषाज्जायते श्लेष्मलोहित-संभवो व्याधिः** ( कासि. १३.३–८ )

लक्षणानि–शिशुः सकण्डुरं नेत्रवर्त्म, तथा नासाललाटमक्षिकूटं च मृन्द्नाति, सूर्यप्रभां न सहते सततस्रवन्नेत्रश्च तिष्ठति नेत्रवर्त्मानि उन्मीलयितुं न क्षमते ( सुउ. १९.९ ) वर्त्मशूलमुच्छूनताम्राक्षत्वं वीक्षणाक्षमत्वं च। अयं दन्तोत्पत्तिनिमित्तजो व्याधिः ( असंउ. ११ ) तत्र चिकित्सा– क्षीरपायिनं पीतदुग्धं बालं मध्वादिभिः पिप्पल्ल्यादिभिर्वाऽपामार्गफलचूर्णैः वामयेत् । अशनदुग्धभुजबालं सवचाभिरपामार्गफलचूर्णैर्वामयेत् । जम्ब्वाम्रादिपत्रकषायैरस्य वर्त्मपरिधावनं तथा सेचनम् । गुडूचीघृतेन त्रिफलाघृतेन वा आश्चोतनम् । मनःशिलाद्यञ्जनम् । नेपालजाद्यञ्जनम् । कृष्णलोहचूर्णं घृतादिघृष्टमञ्जनार्थम् । व्योषाद्यञ्जनम् ( व्योषादिगुटिकाञ्जनम् ) निम्बच्छदाद्यञ्जनम्। जलौकाभिः रुधिराहरणम्, शेफालिकापत्रैर्विनिर्लेखनं त्रिकटुकादिभिः क्षौद्रयुतैश्च प्रतिसारणम् । तथैव स्तन्यदोषचिकित्सा अपि मातुर्धात्र्या वा यावच्छक्यं करणीया
( सुउ. १९.१०–१६ काखि० १३ )
बालकांना डोळ्याच्या पापण्यांना होणारा रोग. अन्न न खाणाऱ्या मुलांना आईच्या वा दाईच्या दुधातील दोषामुळे तसेच दात येण्याच्या वेळी होतो. **लक्षणे**–पापण्यांना सूज व खाज. डोळ्यांची खोवण नाक, कपाळ चोळीत असतो. सूर्याचा प्रकाश सहन होत नाही, तो पाहू शकत नाही. सतत डोळ्यांना गळ, डोळे उघडू शकत नाही, पापण्यातला शूळ, डोळे सुजलेले व तांबडे असतात. **उपचार**–ओकारी करवावी. दूध पिणाऱ्या बालकाला दूध पाजून मध इत्यादींबरोबर किंवा पिंपळी इत्यादींबरोबर आघाड्याच्या तांदुळाच्या–बीचे चूर्ण मिश्र करून पाजावे. अन्न व दूध घेणाऱ्या बालकाला वेखंडाबरोबर आघाडाबीचूर्ण द्यावे. जांभूळ, आंबा इत्यादींच्या पानांच्या काढ्याने डोळे धुवावे. तसेच डोळ्यावर सिंचन करावे. गुळवेलीचे किंवा त्रिफळेचे सिद्धघृत डोळ्यात थेंबरूपाने घालण्याकरिता उपयोगात आणावे. मनशीळ इत्यादी नेपालताम्र इत्यादी व सुंठ, मिरी, पिंपळी इत्यादींची गुटिका, निंबाची पाने इत्यादी योगांचे अंजन, किंवा काळे लोखंड तुपात घासून ते अंजन घालावे. जळवांनी रक्त काढावे. पापण्या राननिर्गुडीच्या पानाने घासाव्या. सुंठ, मिरी, पिंपळी इत्यादींचे चूर्ण मधाबरोबर पापण्यावर आतून चोळावे तसेच आई किंवा गाईच्या दुग्धशुद्धीची योजनाही शक्य ती करावी.

**कुकूल**–पु., न., करीषाग्निः ( चचि. १.७५ )
रानशेणीचा अग्नि, भूस, भुसाचा अग्नि.
**अपां बाष्पस्वेदः । गोशकृदादिचूर्णसन्तापः इत्यन्ये** ( अहसू. ६.४२ अरुण )
पाण्याच्या वाफेचा शेक. गाईच्या शेणींच्या चूर्णाचा अग्नि.
**चूर्णाग्निः** ( असंउ. २ )
चूर्णाचा–भुसाचा–तुसाचा अग्नि.

**कुक्कुट**–पु., विष्किरपक्षि० स्वनामप्रसिद्धः, ताम्रचूडः ( चसू. २७.४८ )
हिं.—मुरगा.
म.—**कोंबडा.**
बं.—कुकडा.
**बल्यानां श्रेष्ठः** ( चसू. २५–४० )
( असंसू. १३.३ ) **कुक्कुटः श्रोत्रस्वरवयोदृशां पथ्यो, वृष्यो, ग्राम्यः पुनः श्लेष्मलो गुरुश्च** ( अहसू. ६.५९ ) **अन्त्रवृद्धिशूले उपयुक्तं** ( र. १८.४३ ) **कुक्कुटवसा, विष्किरशकुनिवसानां श्रेष्ठतमा** ( चसू. २५.३८ ) **कुक्कुटमांसं नेत्ररोगेषूपयुक्तम्** ( असंउ. १९ ) **उष्णं, स्निग्धं, लघु, स्वर्यं, दीपनं, बृंहणं, वृष्यं, बल्यं, वातहरं च** ( ध. ६.४५८ ) **कुक्कुटाण्डकपालं** ( चचि. २६. २५३ ) **कुक्कुटाण्डत्वक्** ( असंउ. १४ ) **कुक्कुटाण्डदलं** ( सुउ. १८.१०१ ) **वा व्रणशुक्राख्ये नेत्ररोगे वर्तिकर्मणि अञ्जनार्थं च उपयुज्यते । तथैवोत्सन्नमांसेषु व्रणेषु अवसादने प्रशस्तं भवति** ( सुसू. ३७.३१ ) **कुक्कुटघृतं तु ऊर्ध्वजत्रुविकारेषूपयुक्तम्** ( चचि. २६.१७५ )
कोंबडा. बलवर्धक द्रव्यात श्रेष्ठ, कोंबड्याची चरबी. उकरून भक्ष्य खाणाऱ्या सर्व पक्ष्यांच्या चरबीत अतिश्रेष्ठ. कोंबडा, कान, स्वर, दृष्टि, वय यांना उत्तम. **मांस**–नेत्ररोगात उपयोगी. उष्ण, स्निग्ध, हलके, पौष्टिक, शुक्रधातूला बलकर, अग्निदीपक व वातनाशक, आन्त्रवृद्धीतील शूळास उपयुक्त. गांवातील कोंबडा जड आणि कफवर्धक. **अंड्याची कवची**– डोळ्याच्या व्रण व फूल पडणे या विकारात हिची कांडी ( वात ) अंजनाकरिता व्रणातील वरउचललेले व वाढलेले मांस कमी करण्याकरिता चांगली. सिद्धतूप मानेच्या वरच्या सर्व विकारांवर उपयुक्त.
**वनस्पति० शितिवारः** ( ध. १.१५५ ) कुरडू.

**( कुक्कुटी )**–स्त्री., कुक्कुटवर्गे स्त्रीलिङ्गी प्राणि० ( असंशा. ४.२० ) कोंबडी.
शाल्मली ( ध. ५.१२७ र. २०.३६ )
( सुउ. २९.७६०.४८ असंउ. ४९ ) सावरी.

**–पुट**–न., पुट० **भूमितले वितस्तिद्वितयमात्रनिम्नविस्तारे खाते दीयमानं पुटम्** ( र. १०.६० )
दोन वीती खोल आणि रुंदी लांबीच्या खड्डयात दिले जाणारे पुट.

**कुक्कुटाण्डक**–पु., धान्य० **व्रीहिभेदः, वर्णेन आचारतश्च कुक्कुटाण्डसमाः तण्डुला यस्य सः कुक्कुटाण्डको व्रीहिभेदः** (सुसू. ४६.१२) द्र० 'व्रीहि.'
कोंबड्याच्या अंड्याच्या वर्णाची तांदुळाची जात.

**कुक्कुटी**–स्त्री., ( सुउ. २९.७ ६०.४८ ) देवडांगरी.

**–पुट**–न., कुक्कुटपुटम् ( र. १२.११० )
पहा 'कुक्कुटपुट.'

**कुक्कुणक**–पु., रोग० कुकूणकः ( काखि. १३.१ )
पहा, 'कुकूणक'.

**–चिकित्सित**–पु., अध्याय० ( काखि. १३ )
अध्यायाचे नाव. कुकूणकाचे उपचार दिलेला अध्याय.

**कुक्कुभ**–पु., प्राणि० ताम्रचूडभेदः, वनकुक्कुटः ( चसू. २७.४७ )
रानकोंबडा. कोंबड्याचा प्रकार.

**कुक्कुर**–पु., प्राणि० **शृगालभेदः, सारमेयः, मांसगुणाः– उष्णो विपाके वातनाशनः** ( ध. ६.४४२ )
एक प्राणी. कोल्ह्याची जात. कुत्रा.
**गुण**–याचे मांस उष्ण असून पचनानंतर वातनाशक होते.

**कुक्षि**–स्त्री., शारीर० **बाह्यप्रत्यङ्गम्, पार्श्वान्तरालः** ( सुसू. २९.१० ) **उदरपार्श्वदेशः**
( चचि. १३.३७ कासू. २८.६ ) **प्रशस्ताप्रशस्तलक्षणम्–कुक्षिसमुन्नतौ प्रशस्येते । लोमशौ प्रव्रज्यायै सिरालौ कुभोजनाय । निम्नौ दारिद्राय । समौ मध्यत्वाय । दक्षिणोन्नतौ पुत्रजन्मने । वामोन्नतौ विपरीतौ** ( कासू. २८ )
शारीरस्थान. शरीराचे बाहेरचे उपांग. काखे पासून कंबरेपर्यंतची शरिरातली पोकळी. पोटातला हाताच्या दिशेकडील भाग. **कूस. लक्षण**–दोन्ही कुशी चांगल्या उंचावलेल्या, आरोग्य, कर्तृत्व, भाग्यदर्शक. तिच्यावर शिरा असणे जेवण चांगले मिळणार नसल्याचे लक्षण. कुशीवर **केस असणे**–संन्यास घेण्याचे, खोलगट असणे दारिद्र्याचे लक्षण. ती उजवी उंचावलेली असणे पुत्र संततीची, डावी उंच असणे कन्या संततीची. दोन्ही सारख्या असणे सर्व ठीक असण्याची दर्शक आहे.
**उदरम्, शारीर० उदरान्तरावकाशः** ( चसू. १८.३१ अहृसू. ११.१३ )
शरीरविभाग. पोटातील पोकळी.
**आमाशयः, जठरम्** ( असंसू. १०.७५ ) ( अहृसू. ८.४६ )
अन्न गिळल्यानंतर ते ज्या थैलीमध्ये येऊन पडते तो अवयव. जठर. अन्नाशय. पचण्यापूर्वीच्या म्हणजे आम–कच्च्या आहाराचा आशय.
**गर्भाशयः** ( चशा. ६.२० २.१६ ) ( ४.७५ चनि. ३.१४ सुशा. २.४८ ) ( सुनि. ९.८७ ) गर्भाशय.

**–ग्रह**–पु., लक्षण० कुक्षेर्ग्रहः ( चसि. ९.६ ) ( अहृसू. १७.२६ ) **ग्रहो नाम स्तम्भ इव गात्रस्य वातेन चेष्टानिरोधः**
कूस गच्च होणे, ताठरणे, हालचाल न होणे. धरणे हे वाताने होते.

**–रन्ध्र**–पु., वनस्पति० नलः ( रा. ८. २२१ )
एक वनस्पती. नळ, बोरू, बांबू.

**–रोग**–पु., रोग० **कुक्षिरत्र पुरीषाशयादिस्तत्रस्थो विकारः** ( चचि. १५.४९ ) **अतीसारः** ( हे. अहृसू. ६.२८ )
कुशीचे रोग. येथे कूस म्हणजे मलाशय इत्यादी. मलाशय इत्यादींचे विकार; अतिसार इत्यादी.

**–शूल** पु., न.,–रोग० **आमसमुद्भवो रोग० यदा मारुतः कुक्षौ वह्निमाक्रामति तदा भुक्तं न पच्यते। उपस्तब्धता च भुक्तस्य जायते । श्वसन्नयं रुग्ण आमशकृच्छूलेन मुहुर्मुहुराहन्यते । आसीनः, शयानस्तिष्ठन्वा न सुखं भजते । अयं वातज आमजन्यः कुक्षिशूलः** ( सुउ. ४२. १२३–१२५ )
आमापासून उत्पन्न होणारा रोग. जेव्हा वात कुशीत अग्नीवर आक्रमण करतो तेव्हा खाल्लेले पचत नाही. घेतलेला आहार जेथे तेथे थबकतो. मळ चांगला होऊन बाहेर जात नाही. आम व मळ संचित झाल्यामुळे रोगी शूळाने पुन्हा पुन्हा बेजार होतो. श्वास लागतो. बसून, निजून, उठून कोणत्याही अवस्थेत चैन पडत नाही. हा वात व आम यांपासून होणारा.

**-संग्रह**-पु., लक्षण० **कुक्षिग्रहः** ( चसू. १४.२२ )
एक लक्षण. कूस धरणे, जखडणे, फुगणे.

**-स्थ**-वि., **गर्भाशयस्थः** ( सुशा. १०.५४ )
येथे कुक्षिशब्दाचा अर्थ गर्भाशय आहे. गर्भाशयस्थ. गर्भाशयात, गर्भाशयातला.

**कुक्ष्यवस्रंस**-पु., **गर्भाशयस्याधोभागे अवतरणम्। प्राप्तप्रसवाया गर्भिण्या लक्षणम्**
( काजाति. शा. ( पृ. ८४ )
गर्भ, गर्भाशयाच्या खालच्या भागात योनिप्रदेशात उतरणे. प्रसूतीच्या वेळचे गर्भिणीचे लक्षण.

**कुङ्कुम**-न., वनस्पति० **सुगन्धिद्रव्यम्, एलादिगणे एकं द्रव्यम्** ( सुसू. ३८.२४ )
एक वनस्पती. केशर. सुगंधिद्रव्य एलादिगणात आहे.
**अस्य पुष्पगुणाः-सुगन्धि विशदं हृद्यं श्लेष्मपित्त-विषघ्नं च** ( सुसू. ४६.२८७ ) **गुणाः-कटुस्तिक्तम्, उष्णं, कायकान्तिकृद्रोचनं, श्लेष्मवातघ्नं, व्रणशोधनं, कासकण्ठरुजाघ्नं, शिरःशूलविषदोष-नाशनम्** ( ध. ३.१२ रा. १२.२२ )
**कण्डूपिडकाकोठनाशनम्** ( सुसू. ३८.२५ )
हिं.—केसर, केशर; जाफरान.
म.—**केशर.**
गु.—केशर.
बं.—कुंकुम.
त.—कुंकुमं.
का.—फरकी मास.
**केशराच्या फुलाचे गुण,** सुगंधी, हृदयाला हितकारक, कफपित्तविषनाशक, ओलेपणा, चिकट-पणा नाहीसे करणारे. **केशराचे गुण**-तिखट, कडु, उष्ण, कफवातनाशक, कांती वाढविणारे, रुचकर, व्रण शुद्ध करणारे, खोकला, गळ्यातील वेदना, डोकेदुखी, विषदोष, कंडू, पुळ्या, चकंदळे नाशक.

**कुङ्कुमाद्यगद**-पु., अगद० **शतपद्विषनाशनः**
( सुक. ८.४९-५१ )
केशर इत्यादी द्रव्यांनी सिद्ध असा विषनाशक योग. शतपदविषनाशक.

**कुच**-पु., शारीर० **स्तनः** ( सुशा. ३.८ ) ( कासू. १९ )
शरिराचे उपांग, स्तन, थान.

**-फल**-पु., वनस्पति० **दाडिमम्** ( रा. ११.९४ )
एक फळ; डाळिंब.

**कुचैली**-स्त्री., **पाठा** ( रा. ६.९९ ) पहाडमूळ.

**कुज**-न., वनस्पति० **नीलपद्मम्** ( **उत्पल** )
( ध. ४.१५० ) निळे कमळ.

**कुञ्चन**-न., नेत्ररोग० **यदा वाताद्या दोषा वर्त्मसंकोचं जनयन्ति तदा द्रष्टुं न पार्यते स रोगः कुञ्चनमिति कथ्यते** ( मा० )
एक नेत्ररोग. जेव्हा वातादी दोष वाढून ते पापण्यांचे आकुंचन करतात तो मनुष्य पाहूशकत नाही तेव्हा त्याला कुंचन म्हणतात.
लक्षण० **संकोचनम्** ( चचि. २८.७२ ) ( सुचि. ४.१६ ), ( सुउ. ३९.८७ )
एक लक्षण. आकुंचन, संकोच, आखडणे.

**कुञ्चिका**-स्त्री., वनस्पति० **वनमेथिका** ( रा. ५.१८५ )
एक वनस्पती. रानमेथी, मेथिका.
( चचि. ३०.५४; ) ( ध. ६.१११ ) मेथी.
**स्थूलजीरकम्, कारवी कुञ्चिकाऽजाजी कबरी धान्य-तुम्बरु। अन्नगन्धहरं, रुच्यं, दीपनं, कफवातजित्**
( चसू. २७.३०७ ) ( असंसू. १२.६३ )
( ध. २.५९ )
जाडे जिरे, मोठे जिरे. अन्नाचा नापसंत-न आवडणारा वास नाहीसे करणारे, रुचकर, अग्निदीपक व कफवातनाशक.

**कुञ्चित**-वि., **कुटिलम्, वक्रम्** ( सुचि. २५.३६ )
वाकडे, वेडेवाकडे, नागमोडी.
न., वनस्पति० **तगरः** ( ध. ३.५३ ) तगर.

**( कुञ्चिता )**-स्त्री., **कुटिलीभूता ( सिरा ) दुष्टव्यधे सिराप्रकारः** ( सुशा. ८.१९ )
वेडीवाकडी-वाकडी झालेली शीर. शीर नीट कापली न जाण्याचे एक कारण. नीट न कापली-गेलेली शीर.

**( कुञ्ची )**-स्त्री., वनस्पति० **जीरकभेदः, स्थूलजीरकः, कुञ्चिका** ( ध. २.५९ ) द्र० '**जीरक.**'
एक वनस्पती. जिऱ्याचा प्रकार. मोठे-जाड जिरे.

**कुञ्जर**-पु., वनस्पति० **गजपिप्पली** ( र. २७.३७ )
गजपिंपळी.
प्राणि० **गजः** ( सुचि. २९.१६ ) ( सुक. १.६२ )
एक प्राणी. हत्ती.

**कुञ्जरा**-स्त्री., वनस्पति० **धातकी** ( ध. ३.९० )
धायटी.

**-क्षारमूल**-न., वनस्पति० **मूलकम्** ( रा. ७.५१ )
मुळा.

**-शुण्डिका**-स्त्री., वनस्पति० हस्तिशुण्डी (र. २७.३८)

हत्तीसोंड, हत्तीच्या सोंडेसारखा फांदीचा शेवटचा भाग दिसणारी एक वनस्पती.

**कुञ्जवल्लरी**-स्त्री., वनस्पति० निकुञ्जिका (रापरि. ८.३५)

अम्ला, एक वनस्पती.

**कुञ्जिका**-स्त्री., वनस्पति० निकुञ्जिका (रापरि. ८.३५)

अम्ला, एक वनस्पती.

**कुटकास्थि**-न., श्रोणिकाण्डास्थि मयूरास्थीति लोके (सुसू. २३.६)

कंबरेच्या भागातील एक हाड. मोरहाड.

**कुटज**-पु., स्वनामप्रसिद्धो वनस्पति० 'कुडा' इति लोके ख्यातः (चसू. २.७) इन्द्रवृक्षः, शक्रः, गिरिमल्लिका, वत्सक इत्यादीन्यस्यापरनामानि भवन्ति (चक. ५.४)

प्रावृषि कुटजः पुष्पितो भवति (सुसू. ६.३३) अस्य बीजम् इन्द्रजव, इन्द्रयव इति वा लोके प्रसिद्धं वर्तते (चसू. १.८३) महाकषायवर्गे, अर्शोघ्नगणे तथा कण्डूघ्नगणे च निर्दिष्टः (चसू. ४.११ (१२)

द्विविधो हि कुटजः स्त्रीपुरुषभेदेन । बृहत्फलः, श्वेतपुष्पः, स्निग्धपत्रः, पुमान् भवेत्, अणुफलवृन्तः श्यावारुणपुष्पोऽस्ति इति (सुसू. ११.११) आरग्वधादिगणे निर्दिष्टः (सुसू. ३८.६) क्षारनिष्कासनार्थम् उपयुक्तेषु द्रव्येष्वेकः (सुसू. ११.११)

कुटजोऽतिसारे इति अग्र्यसंग्रहे उल्लिखितः (अहउ. ४०.४९)

रक्तार्शप्रशमनानां श्रेष्ठः (असंसू. १३.३) अस्य शारदानि फलानि वमनोपयोगीनि (असंसू. १४.३)

गुणाः-कटुस्तिक्तः, कषायो, रूक्षः, शीतवीर्यः, पित्तप्रशमनः, कुष्ठातिसाररक्तपित्तार्शस्त्वग्दोषनाशनः (ध. २.१३)

हिं.—कुडा; कूड; कोरैया; कुठेया.
म.—**कुडा.**
गु.—कुडो;
बं.—कुडची गाछ; करची.
ता.—कुटचप्पालै.
फा.—झबन-इ-गुंगिषक-इ-तलक.

कुडा. इंद्रवृक्ष. इत्यादी पर्याय नावे. कुडा पावसाळ्यात फुलतो. याच्या बीला इंद्रजव म्हणतात. महाकषायवर्ग, मूळव्याधनाशक गण; आरग्वधादी गण; तसेच कंडूघ्नवर्गात कुडा आहे. प्रकार २. स्त्री व पुरुष जातीचा. पांढरी फुले, मोठी शेंग व पाने, स्निग्ध असणारा पुरुष जातीचा व लहान शेंग व देठ काळसर लालसर फुले असणारा स्त्री जातीचा. क्षार काढावयाच्या द्रव्यांपैकी एक. अतिसार, रक्तीमूळव्याध यांच्या नाशक द्रव्यांपैकी एक श्रेष्ठ द्रव्य. शरदृतूत येणाऱ्या शेंगा ओकारीकरिता. **गुण**-तिखट, कडू, तुरट, थंड, रूक्ष, पित्तशामक, कुष्ठ, अतिसार, रक्तस्राव मूळव्याध व त्वचेचे रोगनाशक.

**-त्वच्**-स्त्री., कुष्ठहरलेपे उपयुक्ता (चसू. ३.१५) श्लेष्मपित्तरक्तसंग्रहणीयोपशोषणानां श्रेष्ठा (चसू. २५.४०; असंसू. १३)

कुड्याची साल. कुष्ठहर लेपात उपयुक्त. कफपित्तरक्त यांचा स्राव थांबवणे व त्यांचा शोष करणे-सुकवणे हे कार्य करणाऱ्या द्रव्यात श्रेष्ठ आहे.

**-पुष्पकल्क**-पु., योग० आमलकरसेन साकं मधुयुतः कुटजपुष्पाणां कल्कः, सर्वमेहेषूपयुक्त एक औषधियोगः (सुचि. ११.८)

कुड्याच्या फुलांची चटणी. आवळकटीच्या रसाबरोबर मध घालून खावी. हा सर्व प्रमेहांवर उपयुक्त असा योग आहे.

**-फल**-न., वनस्पति० कुटजबीजः इन्द्रयवः (सुसू. ४३.५) बृहत्यादिगणे तथा हरिद्रादिगणे निर्दिष्टः (सुसू. ३८.३१)

कुड्याचे बी. इंद्रजव. डोरली इत्यादी व हळद इत्यादी गणात हे आहे.

**-बीज**-न., वनस्पति० इन्द्रयवः (सुसू. ३८.२७) कुष्ठहरलेपे उपयुक्तम् (चसू. ३.१४)

इंद्रजव. कुष्ठनाशक लेपात उपयोगी.

**कुटजाभिधा**-स्त्री., वनस्पति० इन्द्रयवः (रा. ९.२२)

इंद्रजव.

**कुटजाफल**-न., वनस्पति० इन्द्रयवः (रा. ९.२१)

इंद्रजव.

**कुटजीव**-पु., वनस्पति० पुत्रजीवः (रापरि. ९.३१)

पुत्रजीव. मुलगा व्हावा म्हणून याच्या फुलांच्या माळा घालतात.

**कुटजोद्भव**-पु., वनस्पति० इन्द्रयवः (असंसू. १६ अहसू. १५.३५) इन्द्रजव.

**कुटन्नट**–पु., वनस्पति० टिण्टुकः ( सुसू. ३८.१४; ध. १.११४ )
टेंटु. दिंडा. नागरमोथा.
**वन्यकः फञ्जीदमनकः** ( सुक. ६.१७ )
एक वनस्पती.
न., **तगरः** ( सुउ. ११.५ ) तगर.
**कैवर्तमुस्तकम्** ( चचि. १५.१२५ )
( चसि. १०.२३ ) नागरमोथा.
**परिपेलवः** ( असंउ. १० ) नागरमोथा.

**कुटप**–न., वनस्पति० **रक्तपद्मम्** ( ध. १०.२४३ )
रक्तकमळ.

**कुटपिनी**–स्त्री., वनस्पति० **पद्मिनी**
( ध. ४.१५७ ) कमळिनी.

**कुटरणा**–स्त्री., वनस्पति० **अरुणमूलत्रिवृत्**
( अहृसू. १५.४५ ) तांबडे तेड.

**कुटामोद**–न., भैषज्य० जवादि ( रापरि. १२.७ )
एक औषध. सुगंधी–काळे पिवळे, उन्हात अधिक सुगंधी.

**कुटिञ्जर**–न., शाक० **फञ्जीचिल्ल्यादिगणे** (चसू. २७.९९)
**ताम्रमूलकः शाकविशेषः** ( अहृसू. ६.९३ )
तांदुळजा. एक भाजी. भारंगी चील इत्यादी गणात आहे.

**कुटिल**–न., खनिज० **वङ्गः** ( र. २.७५ )
कथील, एक धातु.
**वनस्पति० तगरः** ( ध. ३.५३ )
एक वनस्पती. तगर.
पु., **भैषज्य० शङ्खः** ( रा. १३.२४३ )
एक प्राणिज द्रव्य. शंख.

**( कुटिला )**–स्त्री., वनस्पति० **स्पृक्का** ( रा. १२.११३ )
एक वनस्पती, पिंडका, त्रायमाण.
**–सिरा**–स्त्री., **अनृजुः सिरा, सा अशस्त्रकृत्या**
( असंशा. ६.२१ ) वाकडी शीर.

**कुटिलोपस्थ**–वि.,लक्षण० **कुटिलं नाम वक्रं जातम् उपस्थं यस्य । रिष्टलक्षणम्** ( चचि. १३.५२ )
एक लक्षण. वाकडे शिश्न. वाकडे झालेले जननेंद्रिय ज्याचें असा. हें एक मरणसूचक लक्षण आहे.

**कुटी**–स्त्री., वनस्पति० **मुरा** ( ध. ३.६७ )
अतिशय थंड, कडू, फार सुगंधी वनस्पती.
**रसायनप्रयोगार्थं निर्मितं गृहम्** ( र. २८.१०० असंसू. २६.१४ )
रसायन औषधींचा प्रयोग करण्याकरिता निर्मिलेले घर–झोपडी. शरिराचे सर्व धातु उत्तम दर्जाचे व्हावे म्हणून ध्यावयाची औषधी.
**–प्रवेश**–पु., **कुटीनिवासः** ( चचि. १. (४) २७ )
झोपडीत शिरणे, राहाणे.
**–प्रावेशिक**–वि., उपक्रम० रसायनप्रयोग० **कुटीप्रवेशेन यत् क्रियते तत् कुटीप्रावेशिकम् । रसायनानां द्विविधं प्रयोगम् ऋषयो विदुः । एकं कुटीप्रावेशिकं द्वितीयं वातातपिकं च । कुटीप्रावेशिकविधिः– आदौ कुटीं कारयेत्, तद्यथा–नृपवैद्यद्विजातीनां साधूनां पुण्यकर्मणां निवासे निर्भये शस्ते प्राप्योपकरणे पुरे, पूर्वोत्तरस्यां दिशि सुभूमौ कुटीं कारयेत् । सा च विस्तारोत्सेधसंपन्ना, त्रिगर्भा, सूक्ष्मलोचना, घनभित्तिः, ऋतुसुखा, सुस्पष्टा, मनसः प्रिया, अशस्तशब्दानामगम्या, स्त्रीविवर्जिता इष्टोपकरणोपेता, सज्जवैद्यौषधद्विजा च भवितुम् अर्हति । अथ उदगयने शुक्लपक्षे तिथिनक्षत्रपूजिते मुहूर्तकरणोपेते प्रशस्ते दिने, कृतवापनः धृतिस्मृतिबलं कृत्वा श्रद्दधानः समाहितो, मानसान् दोषान् विधूय, भूतेषु मैत्रीं चिंतयन्नग्रे देवताः द्विजातींश्च पूजयित्वा, देवगोब्राह्मणान् प्रदक्षिणं कृत्वा, तां कुटीं प्रविशेत्** ( चचि. १.१६–२४ )
कुटीत–झोपडीत राहून करावयाचा रसायनप्रयोग. दोन प्रकारचा आहे. एक कुटीप्रावेशिक व दुसरा वातातपिक. कुटीमध्ये प्रवेश करण्याचा **विधि**–प्रथम कुटी करावी. साधुवृत्तीच्या, नित्य पुण्यकर्म आचरणाऱ्या, राजा, वैद्य, ब्राह्मण यांच्या निवासस्थानाजवळ, पूर्व व उत्तर दिशेला ( ईशान्येला ) निर्भय प्रशस्त अशा चांगल्या जमिनीवर कुटी करावी. ज्या शहरात सर्व तऱ्हेच्या गरजेच्या वस्तु व उपकरणे वेळेवर मिळू शकतील असे शहर जवळ असावे. कुटी लहान नसावी. विस्तृत असावी. तिच्या भिंती जाड असाव्यात. एकात एक अशी तीन एकंदर दालने असावीत. भिंतीला बारीक भोके ( झरोके ) असावेत. कोणत्याही ऋतूची बाधा होऊं नये अशी व्यवस्था असलेली व मनाला प्रसन्न करणारी असावी. तेथे सर्व गरजेच्या वस्तु उपकरणे असावीत. स्त्री तिकडे फिरकताही कामा नये. औषधे, वैद्य, ब्राह्मण तेथे उपस्थित असावेत. तेथे अशिष्ट, कर्कश असे शब्द ऐकायला येतां उपयोगी नाही, अशी झोपडी असावी. उत्तरायणात शुक्ल पक्षात शुभ अशा तिथिनक्षत्रावर चांगला मुहूर्त व करण

असलेल्या मंगल दिवशी क्षौर करून धैर्य धरून आपणास काय करावयाचे कसे वागावयाचे याचे स्मरण करून; उत्साहाने श्रद्धेने युक्त मनातील सर्व किल्मिषे काढून; प्राणिमात्राच्या मैत्रीचाच मनात भाव ठेवून; इष्ट देवता व ब्राह्मण यांची पूजा करून; देव, गाय, ब्राह्मण यांना प्रदक्षिणा घालून त्या कुटीत प्रवेश करावा.

**–स्वेद**–पु., **स्वेद० कुटीं नात्युच्चविस्तारां वृत्तामच्छिद्रामुपनाहकल्कघनप्रदिग्धकुडयां सर्वतो विधूमप्रदीप्तखदिराङ्गारपूर्णहसन्तिकासमूहपरिवृतां विधाय तन्मध्ये च शय्यां स्थापयित्वा तत्रस्थं स्वेदयेदिति कुटीस्वेदः** ( असंसू. २६.१४ ) **तत्र कुटीस्वेदः– पूर्वोक्तायां कुटीमध्ये स्वास्तीर्णां शय्यामुपकल्पयेत्, प्रावाराजिनकौशेयकुथकंबलगोलकैर्हसन्तिकाभिरङ्गारपूर्णाभिस्तां च सर्वशः परिवार्यान्तराऽभ्यक्त आरोहेत्** ( चसू. १४.५२–५४ ) **चतुर्द्वारायां कुट्यां स्वेदयोग्यं पुरुषमुपवेश्य, चतुर्द्वारेऽङ्गारानुपसन्धाय तं पुरुषं स्वेदयेत्** ( सुचि. ३२.१० )

एक प्रकारचा घाम काढण्याचा विधि. शेकण्याचा विधि. फार उंच फार विस्तृत नसलेल्या वाटोळ्या व झरोके नसलेल्या कुटीत, भोवतालच्या भिंतीला औषधांची चटणी दाट लावून, निर्धूम फुललेले निखारे असलेल्या शेगड्या ठेवून, मध्ये शय्या ठेवून भोवताली खैराचे निखारे ठेवून तेथे रुग्णाला बसवून किंवा निजवून शेक द्यावा, घाम काढावा. रुग्णाला वातनाशक तेलाचा अभ्यंग करावा. रुग्णाने अंगावर एखादे रजईसारखे कापसाचे किंवा रेशमाचे वस्त्र, कातडे, लोकरीचा रग, कांबळे, रोहिस गवताचे विणलेले चटई इत्यादी आवरण पांघरून तेथे बसावे व शेक घेऊन घाम येऊ द्यावा. चार दारे असलेल्या कुटीमध्ये मनुष्याला बसवून ४ ही दारांत निखारे ठेवून स्वेद द्यावा, असे सुश्रुतमत.

**कुटुम्बक**–पु., **वनस्पति० भूतृणम्** ( ध. ४.४७ )
रोहिस गवत.

**कुटुम्बिनी**–स्त्री., **वनस्पति०, गुणाः–मधुरा, ग्राहिणी, कफपित्तनुद्, व्रणास्त्रदोषकण्डूतिनाशनी, रसायनी च** ( रा. परि. ५.२३ )
क्षीरकाकोली दुधाळ वनस्पती. **गुण**–गोड, मळबांधणारी, कफपित्तनाशक, व्रणातले दोष अति खाजनाशक, व्रणातला रक्तस्राव कमी करणारी व शरिरातील सर्व धातूंची वाढ व दर्जा उत्तम करणारी आहे.

**कुट्टक**–न., **कुट्टितम्, कुट्टनेन अणुशः कृतम्** ( चचि. २. ( ४ ) १९ )
कुटलेले, बत्त्याने कुटून बारीक केलेले चूर्ण.

**कुट्टन**–न., **चूर्णीकरणम्** ( अहसू. २६.२३ )
चूर्ण करणे.

**कुट्टित**–वि., **चूर्णितम्** ( असंसू. २६.२२ )
कुटलेले, चूर्ण केलेले.

**–सिरा**–स्त्री., **या पुनः पुनः अनासादिता ( अप्राप्ता ) अनुत्थिता । अंतयोः बहुशः शस्त्राभिहता सा 'कुट्टिता' सिरा भवेत् । दुष्टे सिराव्यधे लक्षणमेकम्** ( सुशा. ८.१९ )
जी शीर फुगलेली नसल्यामुळे सापडत नाही व पुन्हा पुन्हा शस्त्र चालविल्यामुळे निरनिराळ्या ठिकाणी अर्धवट कापली गेल्याने जी अव्यवस्थित विद्ध झाली ती. दोषयुक्त सिरा व्यधाचे एक लक्षण.

**कुट्टिम**–पु., **वनस्पति० दाडिमम्** ( ध. २.६१ ) डाळिंब.

**कुठरणा**–स्त्री., **वनस्पति० शुक्ला त्रिवृत्** ( असंसू. १६.३९ ) पांढरे तेड.

**कुठारच्छिन्ना**–स्त्री., **वनस्पति० गुडूची** ( र. २८.५४ ) **कन्दगुडूची** ( र. २८.५४ )
एक वनस्पती. गुळवेल. कंद असलेली गुळवेल.

**कुठारिका**–स्त्री., **व्यधनोपयोगि शस्त्र० कुठारतुल्या कुठारिका, कुठारिकाया वृन्तं सार्धसप्ताङ्गुलायतम्, फलमर्धाङ्गुलायामं गोदन्तसदृशं समं च । व्यधने कुठारिका–व्रीहिमुख–आरावेतस–पत्रकाणि सूची च** ( सुसू. ८.४ ) **कुठारिका पृथुदण्डा गोदन्ताकारा अर्धाङ्गुलफला अस्थ्याश्रितसिराव्यधार्था** ( असंसू. ३४.२८ )
शीर तोडण्याकरिता कुऱ्हाडीच्या आकाराची लहान कुऱ्हाड ( शस्त्र ) या कुऱ्हाडीचा दांडा ७॥ अंगुळे लांब, कापणारा फाळ अर्धा अंगुल रुंद, गाईच्या दांता सारखा असावा. सिराव्यधन करण्याकरिता कुऱ्हाड. तांदुळाच्या टोंकासारखे टोकाचे 'व्रीहिमुख' आरी, वेताच्या पानासारखी धार असलेले शस्त्र व सुई योग्य होय. मोठ्या दांड्याची गाईच्या दातासारखा अर्धांगुळा इतका फाळ असलेली कुऱ्हाड हाडावर असलेल्या सिरेचा व्यध करण्याला उपयुक्त.

**कुठारी**–स्त्री., **शस्त्र० कुठारिका** ( अहसू. २६.१२ )
कुऱ्हाड.

**कुठिञ्जर**–पु., कुरहञ्जणः, 'कोल्हसुआ' इति लोके, कुनाडिकेति क्वचित्, तत्र कुनाडिका गोनाडिका लोणिकादि शाकवर्गे । सामान्यगुणाः–स्वादुपाकरसः शीतः कफघ्नो नातिपित्तलो लवणानुरसो रूक्षः सक्षारो वातलः सरश्च ( सुसू. ४६.२७४ )
एक भाजी; गोड पण खारट रस मागाहून लागणारी भाजी; क्षारयुक्त, थंड, पचनानंतर गोड, कफनाशक, थोडी पित्तकर, रुक्ष, वातूळ, सारक.

**कुठेर**–पु., वनस्पति० कुठेरकः ( अहृसू. ६.१०६ ) कुठेरादिगणे एकं द्रव्यम् ( अहृसू. १०.३१ ) तुळस; अजवला.

**कुठेरक**–पु., वनस्पति० अर्जकः ( चवि., ७.१७ ) ( रा. १०.८५ ध. ४.५४ ) तुळस; अजवला.
शाक०, फञ्जीचिह्ल्यादिगणे एकं द्रव्यम् ( चसू. २७.१०१ )
एक भाजी. फंजीचिल्ली इत्यादि गणातील एक.
बर्बरिकाभेदः, पिप्पल्यादिवर्गीयमेकं द्रव्यम् ( सुसू. ४६.२२१ )
भारंग, तिळवण, पांढरे चंदन, पिंपळी इत्यादी गणांपैकी एक.
नन्दीवृक्षः ( ध. ३.१८ ) नांदुरखी, वड, आघाडा.

**कुडव**–पु., न., मान० प्रसृतद्वयं चतुष्पलं वा षोडशतोलकमित्यर्थः । अस्याऽपरपर्यायोऽञ्जलीति ( चक. १२.९३ ) शुष्काणां द्रव्याणां चतुर्भिः पलैः कुडव आर्द्राणां चाऽष्टाभिरिति । जेज्जटस्त्वार्द्राणां द्रवाणां च चतुष्पलं कुडवमाह ( सुचि. ३१.७ )
माप. सोळा तोळे. अंजलि दुसरे नाव. सुकलेल्या द्रव्यांचे १६ तोळे व ओल्यांचे ३२ तोळे. जेज्जट ओली द्रव्येही १६ तोळेच कुडवाची धरतात.

**कुडुहुञ्ची**–स्त्री., वनस्पति० त्रपुसविशेषः, 'क्षुद्रकारलिका' इति नाम्ना प्रसिद्धा, गुणाः–कुडुहुञ्ची तिक्ता कटुरुष्णा रुचिकारिणी दीपनी रक्तानिलदोषकरी पथ्या च । कारलीकन्दमर्शोघ्नं मलरोधविशोधनम् । योनिनिर्गतदोषघ्नं गर्भस्रावविषाऽपहम् ॥ ( रा. ७.२८०–२८३ )
लहान कारले. **गुण**–कडु, तिखट, उष्ण, अग्निदीपक, रुचि आणणारे, रक्तदोषकर व वातवर्धक. बेताने सेवन केल्यास पथ्यकर. **कंद**–कारलीचा कंद मूळव्याधनाशक, मलावरोधनाशक, योनीतून स्रवणारे दोष नाहीसे करणारा, गर्भस्राव बंद करणारा व विषनाशक.

**कुड्मल**–न., वनस्पति० नीलपद्मम् ( ध. ४.१५० )
निळे कमळ.

**कुड्मलक**–न., वनस्पति० नीलपद्मम् ( रा. १०.२४८ )
निळे कमळ.

**कुड्य**–न., भित्तिः (असंशा. १०.१७; र. १०.३४) भिंत.
**–कीटक**–पु., कीट० 'कवडिगणा' 'करडिकाणा' इति वा ख्यातः ( चशा. ८.१९ )
एक किडा. कवडिगणा, करडिकाणा, ही दुसरी नावे.

**कुणज**–शाक० फञ्जादिशाकवर्गीयः ( रापरि. ७.९५ )
फंजी इत्यादी भाज्यांपैकी एक.

**कुणञ्ज**–पु., वनस्पति० कुणञ्जरः ( रापरि. ५.२९ )
( कुणञ्जी ) स्त्री., कुणञ्जरः ( रापरि. ५.२९ )
रानचाकवत.

**कुणञ्जर**–पु., वनस्पति० शाकभेदः, अस्याऽपरनामानि कुणजर, कुणञ्जी च कणञ्जोऽरण्यवास्तुकः कुणञ्जो मधुरो रुच्यो दीपनपाचनो हितः । ( रापरि. ५.२९ )
रानचाकवत. गुण–गोड, रुच्य, अग्निदीपक, पाचक व हितकर.

**कुणञ्जी**–स्त्री., वनस्पति०, कुणञ्जरः ( रापरि. ५.२९ )
रानचाकवत.

**कुणप**–वि., शवगन्धि, दुर्गन्धयुक्तम् ( चइ. २.१३. सु. उ. ४५.१० )
प्रेतासारखी घाण असलेले. दुर्गंधी.
पु., न., शवः ( असंसू. ८.२१ ) प्रेत.
**–गन्धिन्** वि., शवगन्धी ( असंसू. ८.२१ )
प्रेतासारखी घाण असलेले.

**कुणावी**–स्त्री., भक्ष्य० यवपर्पटी ( सुचि. १९.५ )
जवाची पापडी. खाण्याचा एक पदार्थ.

**कुणि**–वि., लक्षण० कुब्जितकरः ( चसि. २.२१ )
सङ्कुचितबाहुमध्यः ( सुशा. ६.२४ )
एक लक्षण. वाकड्या हाताचा. हाताच्या मधला भाग आखडलेला.
**–ता**–स्त्री., लक्षण० हस्तस्य हस्ताङ्गुलीनां वा कुब्जत्वम् ( असंशा. ७.६ )
एक लक्षण. हात किंवा हाताच्या करंगळ्या वाकड्या असणे.

**कुण्टरिका**–स्त्री., वनस्पति० सल्लकी ( रा. ११.१९६ )
तीन कडा असलेले सुगंधी फळ, व सुगंधी मूळ असलेली,

**कुण्ठ**–वि., **शस्त्रदोष० स्थूल धारत्वेन अरोमवाहि** ( सुसू. ८.९ )
शस्त्रातला एक दोष. धार बोथट असल्याने केसही काढता न येणारे शस्त्र.
न., **मुण्डभेदः लोहप्रकाराणामन्यतमस्य मुण्डाख्यस्योपप्रकारः** ( र. ५.७४ ) द्र० **'मुण्डलोह'**
मुण्ड लोखंडाचा एक प्रकार.
**वनस्पति० गुण्ठ** ( ध. १.८३ )
रोहिस गवताचा प्रकार.
**–ता**–स्त्री., **लक्षण० करस्य कस्मिन्नपि व्यापारे स्तब्धतया अप्रवृत्तिः**
एक लक्षण. हात ताठरला असल्याने कोणत्याही कामात त्याची अनुरूप हालचाल करता न येणे.
**–शस्त्र**–न., **अरोमवाहि शस्त्रम्** ( अहृसू. २७.३५ )
केस न काढणारे शस्त्र.

**कुण्ड**–न., **पात्र० द्रोणिः** ( अहृसू. १७.११ )
एक भांडे, डोणी.
**–भेदिन्**–वि., **भ्रष्टयोनिः तेन प्रच्छादितात्मीयनिन्दितजातिः** ( चक्र. )
आपली हलकी जात झाकणारा.
**–मुसल**–न., **तण्डुलादयो येन कुट्ट्यन्ते तन्मुसलम्, ह्रस्वमुसलमित्यर्थः** ( चशा. ८.३४ ) लहान मुसळ.

**कुण्डल**–पु., न., **आभूषण० कर्णकुण्डलम्** ( सुउ. ७.८; चचि. ३०.७ )
एक दागिना. कानातील कुंडल.
**बस्तिरोग० बस्तिकुण्डलः** ( चसि. १२.१६; ) ( र. २२.१५५ ) बस्तीचा एक प्रकार.

**( कुण्डली )**–स्त्री., **उपकरण० कुण्डलाकारं कुण्डम्** ( र. ७.९ )
एक उपकरण. कुंडलासारखे गोल आकाराचे कुंड.
**वनस्पति० गुडूची** ( ध. १.२ )
गुळवेल.
**कोविदारः** ( ध. १.१९६ ) एक वनस्पती. कांचन.
**सर्पिणी** ( रापरि. ५.३९ )
एक वनस्पती. विषनाशक. स्तन पुष्ट करणारी. नागीण.

**कुण्डलिन्**–वि., **आवर्तमानतया स्थितः** ( चसि. ९.३९ )
जणू गोल फिरतो आहे असा असलेला.

**कुतल**–पु., न., **वनस्पति० तिलकाण्डम्** (इंदु.असंउ.२६) **क्षारोऽस्य मूषिकविषे पाने उपयुज्यते** ( असंउ. ४६ त. प्र. पृ. ३६८ )
तिळाच्या झाडाच्या कांडासारखी कांडे असणारी. हिचा क्षार उंदराच्या विषावर पिण्याकरिता.

**कुत्स**–न., **वनस्पति० कुष्ठम्** ( र. १२.९८ )
कोष्ठकोळिंजन.

**कुत्सित**–**वनस्पति० कत्तृणम्** ( रा. ८.१०८ )
रोहिसगवत.

**कुत्सिताम्ब**–**वनस्पति० कदम्बः** ( अहृसू. १५.२६ )
कळंब.

**कुथ**–पु., स्त्री., न., **कार्पासपूरितप्रावरणम्** ( असंसू. ४.१८ )
कापसाच्या कापडाच्या पुडात कापूस घालून शिवलेले पांघरण्याचे वस्त्र. रजई, दुलई.

**( कुथा )**–स्त्री., **आस्तरणम्** ( असंसू. २६.१२ )
आस्तर. आंथरूण, जाजम, सतरंजी, गालीचा, पलंगपोस.

**कुथक**–पु., न., **चित्रकम्बलः** ( चसू. ६.१५ ) गालीचा.

**कुदितिका**–स्त्री., **धान्य० व्रीहिः** ( रा. १६.९९ )
एक धान्य. तांदूळ.

**कुद्दाल**–पु., **धान्य० कोद्रवः** ( रा. १६.१३७ )
एक धान्य. कोद्रु. हरीक.
**वनस्पति० अश्मन्तक** ( रा. २.२९० )
आपटा.
**कोविदारः** ( ध. १.१९६ ) एक वनस्पती. कांचन.

**कुन्त**–पु., **आयुध०** ( सुसू. २८.१८ )
एक शस्त्र. भाला. व्रणाची एक आकृति.
**–वेध**–पु., **संस्कार० कुन्तसमानसंदशाग्रधृतपिण्डीभूतरसेन तारादौ द्रुते सुवर्णाद्युत्पादनम् । नागं वंगं ताम्रं च एकस्मिन् पात्रे अन्यस्मिन् पात्रे पारदं निक्षिप्य तेषां संयोजनं कुन्तवेधः इति उच्यते** ( र. ८.९२ )
धातूंचे सोने करण्याची पाऱ्याची क्रिया. भाल्याच्या टोकाच्या आकाराच्या चिमट्याने पारा पकडून त्याचा तो थेंब पातळ केलेल्या चांदी इत्यादी योग्य धातूमध्ये टाकून सोने करण्याची क्रिया. एका भांड्यात शिसे, कथील, तांबे व दुसऱ्या भांड्यात पारा ठेवून त्यांचा संयोग करणे.

**कुन्तल**–पु., **उपकरण० दर्वी विधाराच्छुरिका कूर्चो वा** ( र. १७.६२ ) एक उपकरण. पळी, पेला, धार नसलेली सुरी, कुंचला.
न., **वनस्पति० वालकम्** ( रा. १०.६९ ) वाळा.

**( कुन्तली )**–स्त्री., शाक० चञ्चुसदृशी दीर्घपत्रा। गुणाः–
तिक्तं पाके कटु ग्राहि वातलं कफपित्तजिच्च
( असंसू. ७.११७ )
एक भाजी. रान तीळ. चोचेच्या आकाराची लांब पानाची भाजी. **गुण**–कडू, पचनानंतर तिखट, मल बांधणारी, कफपित्तनाशक, वातकर.

**–क्षार**–पु., भैषज्य० यवक्षारः ( असंचि. १७ ) जवखार.

**–वर्धन**–पु., वनस्पति० भृङ्गराजः (रा. ४.२०) माका.

**कुन्तालिका**–स्त्री., गौरवर्तुलावगुण्ठितफला 'चिरपोटिका' इति प्रसिद्धा, अस्याः पत्राणि शाकत्वेन उपयुज्यन्ते। गुणाः–स्वादुः तिक्ता च सूक्ष्मतिलजातिः इति केचित् ( सुसू. ४६.२७६ )
जिचे बी पांढऱ्या गोल टरफलाचे असते. चिरपोटिका या नावाने प्रसिद्ध; पाने भाजीकरिता. लहान तिळाची जात. असे एक मत.

**कुन्तिनीबीज**–न., जेपालः ( रा. ६.३४४ ) जयपाळ.

**कुन्तिली**–स्त्री., वनस्पति० कुन्तली ( अहृसू. ६.७६ )
पहा 'कुन्तली.'

**कुन्थन**–वि., दुःखितः ( चचि. ३०.२४० ) दुःखित.

**कुन्द**–पु., मत्स्यजातीयः प्राणि० ( काखिल. २४.५० )
माशाच्या जातीचा प्राणी.
वनस्पति० श्वेतपुष्पक्षुपः ( र. १०.९३ )
( सुउ. ५१.३८ )
गुणाः–अतिमधुरः कषायः शीतः केश्यः कफपित्तहरः सरो दीपनपाचनः ( रा. १०.२५७ ) कुन्दस्य कुसुमं हृद्यं स्वल्पगन्धि मनोहरम् ( ध. ५.१५० )
हिं.—कुन्द.
म.—**कुन्द, कागडा.**
गु.—जेलर.
बं.—कुंद.
एक पांढऱ्या रंगाच्या, थोड्या सुगंधी फुलांचे झुडप. **गुण**–अति गोड, तुरट, थंड, केसाना हितकर. कफपित्तनाशक, सारक, अग्निदीपक, पाचक. **फूल** हृदयाला हितकर, थोडा सुगंध असलेले व मनोहर आहे.

**कुन्दक**–पु., वनस्पति० कुन्दुरुः ( रा. १२.१९० )
पहा 'कुन्दुरु.'

**कुन्दर**–पु., वनस्पति० कुन्दुरुः ( ध. ३.१३१ )
'पहा–कुन्दुरु.'

**कुन्दुरु**–पु., वनस्पति० शाकभेदः ( चचि. २६.६४ ) ( चचि. २८.१५३ ) एक भाजी. पालक. पालख.
निर्यास० गन्धन्द्रव्यम् ( र. २२.१६७ )
गुणाः–मधुरः कटुकस्तिक्तो वातश्लेष्मामयापहः, पाने लेपे च शिशिरः प्रदरामयशान्तिकृत्, कफपित्तार्तिदाहनुत् ( ध. ३.१३२ ) ( रा. १२.१९१ )
हिं.—कुन्दरु, गंधविरोजा.
म.—**साळईचा डिंक.**
गु.—किन्दुरु.
बं—कुंदुरुखोटी.
त.—कुंतुरुकं.
फा.—कन्दुररुमी.
एक डिंक. गंधविरोजा. लोबान. कवड्या ऊद. **गुण**–गोड, तिखट, कडू, वातकफाचे रोगनाशक. पितांना लेपात थंड, प्रदरनाशक, दाहनाशक, कफपित्तवेदनानाशक.

**कुन्दुरुक**–पु., वनस्पति० कुन्दुरुः ( ध. ३.१३१ )
( सुसू. ३८.२४ ) पहा 'कुंदुरु.'

**( कुन्दुरुकी )**–स्त्री., वनस्पति० सल्लकी ( ध. ३.१३५ )
साळई.

**कुन्द्रगोपुर**–पु., निर्यास० कुन्दुरुः ( ध., ३.१३१ )
पहा 'कुंदुरु'.

**कुपिका**–स्त्री., काचकूपी ( र. ७.१९ )
काचेची कुपी, शिशी.

**कुप्य**–न., खनिज० सुवर्णरूप्येतरलोहः। सुवर्णरूप्याभ्यामन्यो धातुः। अन्ये तु अघटितं रूप्यादिकं कुप्यमिति आचक्षते ( सुउ. ४०.१४६ )
खाणीतील सोने व रुपे यांखेरीज धातू. न घडविलेले दागिना मूर्ति इ. न केलेले रुपे किंवा सोने.
रौप्यम् ( ध. ६.५ ) रुपे, चांदी.

**कुबेर**–पु., देवता० धनदः ( सुसू. १९.२३ )
एक देवता, कुबेर, धन देणारा, देवातील सर्वात श्रीमंत. खजिनदार.

**कुबेराक्ष**–पु., वनस्पति० लताकरञ्जः ( रापरि. ८.२४ )
सागरगोटा.

**( कुबेराक्षी )**–स्त्री., वनस्पति० काष्ठपाटला
( ध. १.१२२ ) ( सुउ. ३५.३ ) ( सुसू. ३९.७ )
पाडळ, सागरगोटा.

**कुब्ज**–वि., लक्षण० उन्नतपृष्ठः ( चशा. ३.१५ )
एक लक्षण. पाठीचा भाग उंचावला आहे ज्याचा असा. कुबडा.
वनस्पति० गुञ्जा ( सुचि. ७.६ ) एक वनस्पती, गुंज.
अपामार्गः ( रा. ४.३८८ ) एक वनस्पती, आघाडा.

**-कण्टक**-पु., वनस्पति० खदिरभेदः ( ध. १.२७ ) द्र० 'खदिर'
खैराचा प्रकार.

**-गर्भ**-पु., सहजरोग०, कुब्जत्वयुक्तो गर्भो वातप्रकोपेण गर्भिण्याश्च दौहृदविमाननाद्भवति ( सुशा. २.५१,३०.१८ )
जन्मतः असलेले शरीरवैगुण्य, रोग. कुबडा गर्भ, वाताच्या प्रकोपाने गर्भिणीचे डोहाळे न पुरविल्याने होतो.

**-त्व**-न., वातरोग० अशीतिवातविकारेष्वेकः ( चसू. २०.११ ) स्नायुगतोऽनिलः कुब्जत्वं, खल्लिं बाह्यायाममन्तरायामं सर्वांगैकांगरोगांश्च कुर्यात् ( चचि.२८.३५ ) स्नायुविद्धलक्षणेषु कौब्ज्यमपि एक लक्षणत्वेन कीर्तितम् ( सुसू. २५.३७ )
ऐशी वातरोगांपैकीं एक रोग. स्नायूमधील दुष्ट वायु कुबडेपणा इत्यादी विकार करतो. स्नायूमध्ये शल्य रुतले की कुबडेपणा येतो. हे एक त्याचे लक्षण आहे.

**कुब्जक**-पु., वनस्पति० अस्य पुष्पमञ्जनार्थमुपयुज्यते ( सुउ. १७.८ ) गुणाः—स्वादुः, कषायः, शीतः, सुरभिः, रसायनः, त्रिदोषशमनः, वृष्यः, संग्रहणः ( ध. ५.१४७ ) पुष्पं तु शीतलं वर्ण्यं दाहघ्नं वातपित्तजित् ( रा. १०.२४९ )
हिं.—गुलाब, सेवती, कूजा.
**म.—गुलाब, काटेशेवंती.**
गु.—गोलाबनु फूल.
बं.—श्वेतगोलाप, गोलाप.
त.—गोलाप्पु.
फा.—गले, गुलेमुशकी, गुलिसुसुर्ख.
काटेशेवती, शेवंती.
**गुण**—गोड, तुरट, थंड, सुगंधी, त्रिदोषशामक, शुक्रवृद्धि करणारी, मल बांधणारी, सर्वधातु विशुद्ध व बलवान करणारी. **फूल**—थंड, दाहनाशक, वातपित्तनाशक व वर्ण चांगला करणारे.

**कुब्जीभवन**-न., लक्षण० पृष्ठे प्राप्तमुन्नतत्वम् ( असंउ. २ ) पाठीत उंचपणा येणे, कुबड निघणे.

**कुमर्तिका**-स्त्री., वनस्पति० कण्टकारीभेदः ( ध. १.९७ ) द्र० 'कण्टकारी.'
रिंगणीचा प्रकार. पहा 'कण्टकारी'.

**कुमार**-पु., देवता० कार्तिकेयः ( सुसू. १९.२३ )
एक देवता, कार्तिकस्वामी,
बालकः ( चशा. ८.५१ ) पञ्चवर्षपर्यन्तं कौमारम्- ( रापरि. १८.११ ) कुमारस्य दीर्घायुर्लक्षणानि—तद्यथा-एकैकजा मृदवोऽल्पाः स्निग्धाः, सुबद्धमूलाः कृष्णाः केशाः प्रशस्यन्ते, स्थिरा बहला त्वक्, प्रकृत्याऽतिसंपन्नमीषत्प्रमाणातिवृत्तमनुरूपमातपत्रोपमं शिरः, व्यूढं दृढं समसुश्लिष्टशङ्खसध्यूर्ध्वं, व्यञ्जनसंपन्नमुपचितं वलिभमर्धचन्द्राकृति ललाटं, बहलौ विपुलसमपीठौ समौ नीचैर्वृद्धौ पृष्ठतोऽवनतौ सुश्लिष्टकर्णपुत्रकौ महाच्छिद्रौ कर्णौ ईषत्प्रलम्बिन्यावसंगते समे संहते महत्यौ **भ्रुवौ**, समे समाहितदर्शने व्यक्तभागविभागे बलवती तेजसोपपन्ने स्वङ्गापाङ्गे **चक्षुषी**, ऋज्वी महोच्छ्वासा वंशसंपन्नेषदवनताग्रा **नासिका**, महदृजुसुनिविष्टदन्त**मास्यम्**, आयामविस्तारोपपन्ना श्लक्ष्णा तन्वी प्रकृतिवर्णयुक्ता **जिह्वा**, श्लक्ष्णं युक्तोपचयमूष्मोपपन्नंरक्तं **तालु**, महानदीनः स्निग्धोऽनुनादी गम्भीरसमुत्थो धीरः **स्वरः**, नातिस्थूलौ नातिकृशौ विस्तारोपपन्नावास्यप्रच्छादनौ रक्ता**वोष्ठौ**, महत्यौ **हनू**, वृत्ता नातिमहती **ग्रीवा**, व्यूढमुपचित**मुरः** गूढं **जत्रु पृष्ठवंशश्च** विप्रकृष्टान्तरौ **स्तनौ** असंपातिनी स्थिरे **पार्श्वे** वृत्तपरिपूर्णायतौ **बाहू सक्थिनी** अङ्गुलयश्च महदुपचितं पाणिपादं स्थिरा वृत्ताः स्निग्धास्ताम्रास्तुङ्गाः कूर्माकाराः **करजाः** प्रदक्षिणावर्ता सोत्सङ्गा च **नाभिः**, उरस्त्रिभागहीना समा समुपचितमांसा **कटी** वृत्तौ स्थिरोपचितमांसौ नात्युन्नतौ नात्यवनतौ **स्फिचौ** अनुपूर्वं वृत्तावुपचययुक्तौ **ऊरू** नात्युपचिते नात्यपचिते एणीपदे प्रगूढसिरास्थिसन्धी **जङ्घे** नात्युपचितौ नात्यपचितौ **गुल्फौ** पूर्वोपदिष्टगुणौ **पादौ** कूर्माकारौ, प्रकृतियुक्तानि वातमूत्रपुरीषगुह्यानि तथा स्वप्नप्रजागरणायासस्मितरुदितस्तनग्रहणानि, यच्च किञ्चिदन्यदप्युक्तमस्ति तदपि सर्वं प्रकृतिसंपन्नमिष्टं, विपरीतं पुनरनिष्टम् ( चशा. ८.५१ ) बालास्त्रिविधाः—क्षीरपाः, क्षीरान्नादा, अन्नादा इति । तेषु संवत्सरपराः क्षीरपाः, द्विसंवत्सरपराः क्षीरान्नादाः, परतोऽन्नादा इति ( सुसू. ३५.२९ ) कुमारस्य प्रथमोपवेशनविधिः—पुण्येऽह्नि पञ्चमे मासि चतुर्दिशं बलिं दत्वा द्विकिष्कुमात्रं लिप्तायां धरण्यामुपवेशयेत् । तत्र मन्त्रः—" धरण्यशेषभूतानां माता त्वमसि कामधुक् । अजरा चाप्रमेया च

सर्वभूतनमस्कृता ॥ चराचराणां लोकानां प्रतिष्ठास्य-व्ययासि च । कुमारं पाहि मातेव ब्रह्मा तदनु-मन्यताम् " इति । उपवेशनादनु च बालस्य कटयू-रुजान्वादीन् मर्दयेत् (असंउ. १,) षष्ठे मास्यु-पवेशनं कुर्यात् (काखि. १२.६–९) कुमारा-गारम्–वास्तुविद्याकुशलः प्रशस्तं रम्यमतमस्कं निवातं प्रवातैकदेशं दृढमपगतश्वापदपशुदंष्ट्रिमूषिक-पतङ्गं सुविभक्तसलिलोलूखलमूत्रवर्चःस्थानमहान-सम्‍तुसुखं यथर्तुशयनासनास्तरणसंपन्नं कुर्यात्; तथा सुविहितरक्षाविधानबलिमङ्गलहोमप्रायश्चित्तं शुचि-वृद्धवैद्यानुरक्तजनसंपूर्णम् (चशा.८.५९) तथैववृद्ध-स्त्रीवैद्यसेवितं निर्मत्कुणाखुमशकं च शस्यते (असंउ. १.) शयनास्तरणप्रावरणानि कुमारस्य मृदुलघुशुचि-सुगन्धीनि स्युः, स्वेदमलजन्तुमन्ति मूत्रपुरीषो-पसृष्टानि च वर्ज्यानि स्युः, असति संभवे अन्येषां तान्येव च सुप्रक्षालितोपधानानि सुधूपितानि शुद्ध-शुष्काण्युपयोगं गच्छेयुः । धूपनानि पुनर्वाससां शयनास्तरणप्रावरणानां च यवसर्षपातसीहिङ्गुगुग्गु-लुवचाचोरकवयःस्थागोलोमीजटिलापलङ्कषाशोक-रोहिणीसर्पनिर्मोकाणि घृतयुक्तानि स्युः मणयश्च धारणीयाः । कुमारस्य खड्गरुरुगवयवृषभाणां जीवतामेव दक्षिणेभ्यो विषाणेभ्योऽग्राणि गृही-तानि स्युः, ऐन्द्र्याद्याश्चौषधयो जीवकर्षभकौ च यानि चान्यान्यपि ब्राह्मणाः प्रशंसेयुरथर्ववेदविदः । क्रीडनकानि खलु कुमारस्य विचित्राणि घोषवन्ति अभिरामाणि चागुरूणि चातीक्ष्णाग्राणि चानास्य-प्रवेशीनि चाप्राणहराणि चावित्रासनानि स्युः न ह्यस्य वित्रासनं साधु । तस्मात्तस्मिन् रुदत्य-भुञ्जाने वाऽन्यत्र विधेयतामगच्छति राक्षसपिशाच-पूतनाद्यानां नामान्याह्वयता कुमारस्य वित्रासनार्थं नामग्रहणं न कार्यं स्यात् यदि त्वातुर्यं किञ्चित् कुमारम् आगच्छेत् तत् प्रकृतिनिमित्तपूर्वरूपलिङ्गो-पशयविशेषैस्तत्त्वतोऽनुबुध्य सर्वविशेषानातुरौषध-देशकालाश्रयान् अवेक्षमाणश्चिकित्सितुमारभेत । तथा असौ शर्म लभते चिराय । क्रमेण असात्म्यानि परिवर्ज्योपयुञ्जानः सर्वाण्यहितानि वर्जयेत् । तथा बलवर्णशरीरायुषां संपदमवाप्नोति

(चशा. ८.६०–६५)

कुमारस्य आहारः–प्रथमदिवसे त्रिकालं मधुसर्पिषी अनन्तामिश्रितेमन्त्रपाविते शिशुं प्राशयेत्, द्वितीये तृतीये च दिवसे लक्ष्मणासिद्धं घृतं त्रीनेव कालान् भोजयेत् । तृतीयदिवसात् प्रभृति मातुरेव पिबेत् स्तन्यं तच्चलं देहवृद्धये । मातृस्तन्याभावे धात्री-स्तन्यं योजयेत् । स्तन्याभावे पयश्छागं गव्यं वा तद्गुणं पिबेत्, लघुपञ्चमूलेन सिद्धं शर्करायुतं च

(अहृउ. १.१२–२०)

षष्ठे मासि क्रमादन्नप्राशनं प्रयोजयेत् । अन्नं चिरान्नि-षेव्रमाणो बालो नातुर्यमश्नुते । यथा यथा चान्नं भजेत् तथा तथा स्तन्यं त्यजेत् (असंउ. १)

बालक. पांच वर्षापर्यंतचा बालक. बालकाची **दीर्घायुष्याची लक्षणे**–**केश**–थोडे स्निग्ध काळे मऊ त्यांची मुळे बळकट आणि एका रंध्रातून एकेकटेच असणे चांगले. **त्वचा**–ढिली नसणारी दडस. **डोके**–अति वैभवशाली निर्दोष शरीराच्या मानाने थोडे मोठे पण अनुरूप, छत्रीसारखे गोल. **कपाळ**–विशाल, बळकट, भरीव, सारखे, कानशीळ व सांधे बांधीव भरलेले वरच्या बाजूला अधिक उठावदार दिसणारे पुष्ट वळ्या असलेले अर्धचंद्राच्या आकृतीसारखे दिसणारे. **कान**–कानाची प्रत्येक पाळ जाड, बैठक मोठी व दोन्हीकडे सारखी असलेली, दोन्ही पाळ्या सारख्या दिसणाऱ्या, खालच्या बाजूला वाढलेल्या–लांबट, पाठीमागून पुढे लवलेल्या, पुष्ट व योग्य स्थानी असलेल्या, असाव्या व छिद्रे मोठी असावी. एकमेकात न मिसळता मध्ये अंतर असलेल्या, सारख्या मोठ्या बाहेरच्या बाजूला थोड्या उतरत्या-लोंबणाऱ्या विरल नसलेल्या भरीव केसांच्या. **डोळे**–दोन्ही सारखे, योग्य, आंतील पुतळ्या जागेवर व व्यवस्थित, डोळ्याचा प्रत्येक भाग विभाग स्पष्ट असलेले, रेखीव अंगे व उपांगे, दिसावयाला सुंदर असलेले, सतेज आणि बलवान. **नाक**–सरळ, नाकाचा दांडा मजबूत आणि सुंदर दिसणारा, टोक थोडे खाली झुकलेले व खोल श्वास घेणारे नाक उत्तम. तोंड–दात अगदी व्यवस्थित असलेले, मोठे व सरळ असावे. **जीभ**–लांब व विस्तारयुक्त–पसरट, गुळगुळीत, पातळ, स्वाभाविक रंगाची–लाल चांगली. **टाळू**–गुळगुळीत, योग्य भरदार, पुष्ट उष्णतायुक्त, तांबडी असावी. **स्वर**–मोठा, केविलवाणा न वाटणारा, बळकट, स्निग्ध, ठणठणीत गंभीर आतून घुमत येणारा धिटाईचा उत्तम. **ओठ**–अति जाड किंवा अति बारीक नसलेले, विस्तृत विस्तार असलेले, हिरड्या व दात झाकणारे व लाल असावे. **हनु**-

**वटी** मोठी चांगली. **मान**–गोल पण फार मोठी नसावी. **छाती**–विस्तृत आणि पुष्ट असावी. **जत्रु**–मानेच्या खालचा भाग–गळसरीची दोन्ही हाडे मांसांत आच्छादिलेली चांगली, मांसाने लपलेली. **पाठीचा कणा**–हाही मांसात लपलेला, मांसाने आच्छादिलेला असावा. **स्तन**–दोन्ही स्तनात अधिक अंतर असणे चांगले. **पार्श्वभाग**–स्थिर व फासळ्या दिसणार नाही इतका पुष्ट. **बाहू, मांड्या** व **करंगळ्या**–गोल आणि अधिक व पुऱ्या लांब. **हात व पाय**–मोठे आणि पुष्ट. **नखे**–घट्ट, वाटोळी, स्निग्ध, तांबडी, उंच, लांबट, कासवासारखी चांगली. **बेंबी**–उजवीकडे वळलेली व उंचावलेली. **कंबर**–छातीच्या आकाराच्या दोन तृतीयांश आकाराची सर्वत्र सारखी मांसाने पुष्ट उत्तम. **ढुंगण**–गोल अति उंचावलेले किंवा अगदी खालावलेले नसणारे पण न हालणारे व पुष्ट मांसाने युक्त उत्तम. **मांड्या**–वरवर अधिक गोल व भरलेल्या. खालच्या मांड्या–अति पुष्ट किंवा अति किडकिडीत नसाव्या. **पिंढऱ्या**–शिरा हाड व सांधा वर न दिसता मांसाने झाकलेल्या उत्तम. **घोटे**–अति पुष्ट किंवा अति कृश नसावे. प्रथम सांगितल्याप्रमाणे पाय कासवासारखे उंचावलेले असावे. गुह्य अवयव, गुद, जननेंद्रिय ही व वात, मूत्र, मळ ही योग्य प्रमाणाची असावीत. झोप, जागृतावस्था, श्रम, हसणे, रडणे, स्तनपान इत्यादी व इतरही जे न सांगितले तेही सर्व शरिराला अनुरूप असावे. निर्दोष गुणवान् असावे. **बालांचे प्रकार** ३. दूध पिणारे, अन्न खाणारे व दूध आणि अन्न खाणारे. एक वर्षापर्यंतचे दूध पिणारे, दोन वर्षांपर्यंतचे दूध व अन्न यांवर राहणारे व नंतरच्या वयाचे अन्न खाणारे. **बालकाला पहिल्याने वसविण्याचा विधि**–पाचव्या महिन्याला शुभ दिवशी चारी दिशेला बळी देऊन दोन हात जमीन सारवून तिच्यावर बसवावे. वर निर्दिष्ट केलेला 'धरण्यशेषभूतानां' इ. मंत्र म्हणावा. बसवल्यानंतर बालकाचे कंबर, मांड्या, गुडघे इत्यादी अवयव चोळावेत. ( काश्यप सहाव्या महिन्यात मुलाला बसवावे असे म्हणतात. ) बालकाची नित्याची राहण्याची जागा गृहनिर्माणशास्त्रतज्ज्ञाने संमत केलेली, प्रशस्त, रमणीय, अंधार नसलेली, वारा वाहत नसलेली पण हवाशीर, मधूनच एखादी झुळूक येणारी, पक्षी, हिंस्रप्राणी, पशु, दाताने चावा घेणारे प्राणी, उंदीर, पतंग, डांस, ढेकुण, माशा नसलेली; पाणी, उखळ, लघ्वीकरिता मुतारी व शौचकूप, स्नानगृह, स्वयंपाकगृह यांच्या जागा अगदी निरनिराळ्या असाव्यात. ऋतूला योग्य असे सुखकारक आंथरूण पांघरूण बैठकयुक्त त्याचे निवासस्थान असावे. त्याचप्रमाणे त्या त्या ऋतूला अनुसरून आंथरूण त्यावरची चादर, बैठक, पांघरूण, मऊ, हलकी, स्वच्छ, शुद्ध, सुगंधी असावीत. घामट, मळकट, मळमूत्र लागलेली, जंतुयुक्त घेऊ नयेत. ही दोन दोन किंवा अधिक नसल्यास तीच चांगली धुवून ठेवलेली, धुपवलेली, स्वच्छ व वाळलेली उपयोगात आणावीत. पवित्र आचार–विचाराचे, वयाने व ज्ञानाने वृद्ध स्त्री–पुरुष, वैद्य, व प्रेमीजन त्या स्थानी वावरणारे असावे. धूपाकरिता जव, मोहरी, अळशी, हिंग, म्हशागुग्गुळ, वेखंड, चोरओवा, ब्राह्मी, पांढरी दूर्वा, जटामांसी, कणगुग्गुळ, अशोक, कुटकी आणि सापाची कात तुपातून वापरावी. **धारण**–त्याच्या अंगावर मोती, पोवळे इत्यादी मणी, जिवंत गेंडा, हरिण, रानगाय, बैल यांच्या उजव्या शिंगांच्या टोकाचे तुकडे, ऐंद्री–गोरखकाकडी इत्यादी गणातील तसेच जीवक ऋषभक व अथर्ववेद जाणणारे ब्राह्मण ज्या ज्या वनस्पतींची शिफारस करतील त्या त्या वनस्पती त्याच्या गळ्यात, हातात बांधाव्या. **खेळणी**–चित्रविचित्र, सुंदर, हलकी बारीक टोके नसलेली, तोंडात न जाणारी, त्रासदायक किंवा भीतिकारक नसणारी, प्राणघातक न होणारी व आवाज होणारी असावीत. मुलाला भीति दाखविणे चांगले नाही. म्हणून मूल रडत असता, जेवत नसेल तर, किंवा तो दुसरे काही करताना राक्षस, पिशाच्च, पूतना, बुवा इत्यादि नावांनी हाक मारून भीति दाखवू नये. बालकाला कदाचित् **रोग झाल्यास**–त्याची प्रकृति रोगकारण, पूर्वरूप, रूप, कशाने त्याला बरे वाटते, व कशाने त्याचा रोग वाढतो हे तत्त्वतः जाणून रोगी, औषध, देश, काल यासंबंधी सर्व विशेष ज्ञान असणाऱ्या वैद्याने उपचार केले तर त्याला चिरस्वास्थ्य लाभते. त्याच्या शरिराला आत्मसात् न होणारा आहार क्रमाने बदलून, आत्मसात होणारा आहार द्यावा. जे अहितकर ते सर्व वर्ज्य करावे. म्हणजे बालक शरीरगुणसंपन्न, बलवान, चांगल्या वर्णाचे व आयुष्ययुक्त होते.

**बालकाचा आहार**–पहिल्या दिवशी मध व गाईचे तूप, एक गुंज सुवर्णचूर्ण–भस्म घालून मंत्रोच्चाराने पवित्र करून चाटवावे. किंवा दूर्वांचा रस घालून तिन्ही वेळा चाटवावे. दुसऱ्या आणि तिसऱ्या दिवशी पांढरी रिंगणीने सिद्ध केलेले गाईचे तूप तिन्ही वेळा द्यावे. तिसऱ्या दिवसा पासून आईचे दूध पाजावे. तेच शरीराच्या वाढीला योग्य आहे. आईचे दूध नसेल तर दाईचे दूध द्यावे, अंगावरचे दूध अशक्यच असेल तर बकरीचे किंवा गाईचे दूध आईच्या दुधासारखे करून ते पाजावे. लघुपंचमुळाने ते सिद्ध करून साखर घालून. द्यावे. सहाव्या महिन्यात क्रमाने अन्न देण्याला सुरवात करावी. उशीरा अन्न खाणारा बालक रोगी होत नाही. जसजसे अन्न प्राशन वाढेल तसतसे दूध कमी करावे.

**( कुमारी )**–स्त्री., **रेवतीग्रहस्य नाम**

( काचि बालग्रह० पृ. ९९ )

रेवती नावाचा बालग्रह.

**वनस्पति० वन्ध्यककोंटकी** ( रा. ३.२७४ )

वांझकर्टोली.

**गुणाः–तिक्ता, हिमा, मदगन्धिः, कफापहा, पित्त-कासविषश्वासकुष्ठघ्नी, रसायनी च** ( रापरि. ५.१२ )

हिं.—कुवारपाठा.

**म.—कोरफड, कोरफांटा.**

गु.—कुवार.

बं.—घृतकुमारी.

त.—कुमारी, कट्टालै.

फा.—दरखते सिन्न.

कोरफड. **गुण**–कडू, थंड, कफनाशक, पित्तनाशक, खोकला, श्वास, कुष्ठ व विषनाशक अणि रसादी धातू उत्तम करणारी व मस्त वासाची असते.

**–जीव**–पु., **शाक० जीवशाकम्, फञ्जीचिल्ल्यादिगणे**

( चसू. २७.१०० )

एक भाजी. फंजी चिल्ली इत्यादी भाजीगणातील.

**–तन्त्र**–न., **कौमारभृत्यतन्त्रम् ; अष्टाङ्गनामायुर्वेदस्यैकमङ्गम् । बालग्रहाणां विज्ञानं साधनमुत्पत्तिं कारणं च कुमारतन्त्रेऽभिहितम् । कुमारतन्त्रे एकादश अध्यायाः संति** ( सुसू. ३.३५–३७ )

आयुर्वेदाच्या आठ अंगांपैकी एक अंग. बालग्रहांचे कारण, त्यांची उत्पत्ति, ज्ञान व चिकित्सा कुमारतंत्रात असते. याचे ११ अध्याय आहेत.

**–धार**–पु., **बालचर्यायां सहाय्यकः पुमान् । अलोलुपः अभियुक्तः सदाचारी नातिस्थूलश्च कुमारधारः**

( असंउ. १ )

मुलांना सांभाळणारा. तो लालची नसावा. प्रयत्नशील, सदाचारी व थोडा पुष्ट शरिराचा असावा.

**–प्राश**–पु., **सिद्धकल्पः, बालानामुपयुक्तोऽवलेहः, सुश्रुतोक्ताश्च ते चत्वारः सौवर्णादिप्राशो, मत्स्याक्षकादिप्राशोऽर्कपुष्प्यादिप्राशो हेमचूर्णादिप्राशश्च । एते कुमाराणां वपुर्मेधाबलबुद्धिविवर्धनाः**

( सु. शा. १०.७० )

मुलाला चाटवण्याचा एक औषधि योग. हे चार आहेत. सुवर्णादी दोन, एक मत्स्याक्षकादी, व एक अर्कपुष्प्यादी असे चारही प्राश मुलाच्या प्रकृति इत्यादींच्या विचाराने चाटवावे. हे शरीरधारणशक्ति बल व बुद्धिवर्धक आहेत.

**–बन्ध**–पु., **पारदबन्ध० द्विगुणाभ्रकजीर्णः पारदः । ग्रन्थान्तरे चतुर्गुणाभ्रजीर्णः कुमारः इति**

( र.११.८३ ) द्र० ' पारद. '

पाऱ्याचा एक बंध. एका ग्रंथकाराच्या मते पाऱ्याच्या दुप्पट अभ्रक जिरवलेला पारा मानतो तर चौपट अभ्रक जिरविलेला पारा, असे दुसरा ग्रंथकार मानतो.

**–वर्तनी**–स्त्री., **कुरुक्षेत्रात् पूर्वस्यां दिशि स्थितो देशः**

( काखि. २५.७ )

कुरुक्षेत्राच्या पूर्वेला असलेला देश. रेवाच्या जवळचा देश. कुमारदेश म्हटला जातो.

**–शिराभरद्वाज**–पु., **ऋषि० कुक्षौ गर्भस्य सर्वेन्द्रियाधिष्ठानभूतं शिर एव प्रथमाभिनिर्वर्तत इति अयं प्रतिपन्नः** ( चशा. ६.२१ )

एक ऋषि. आईच्या गर्भाशयात सर्व इंद्रियांचे अधिष्ठान असलेले शिर हाच गर्भाचा प्रथम उत्पन्न होणारा अवयव होय, असे प्रतिपादन करणारे ऋषि.

**कुमारक**–पु., **वनस्पति० वरुणः** ( ध. ५.१९ )

वायवर्णा.

**कुमाराबाध**–पु., **बालरोगः ( स्कन्दग्रहप्रभृतयः )**

( सुउ. १.५ )

स्कंदग्रहादिकांनी झालेला बालरोग.

**( कुमारिका )**–स्त्री., **नेत्रगतप्रतिबिम्बरूपा ( कुमारिका )**

( चइं. ७.३, असंशा. ९.९ )

डोळ्यातील बाहुली. डोळ्यात ज्या भागात समोरच्या पदार्थाचे प्रतिबिंब पडते तो भाग.

**वनस्पति० कर्कोटकी** ( ध. १.१८७ ) कटोली.
**वन्ध्यकर्कोटकी** ( ध. १.१८५ ) वांझकटोली.
**मल्लिका** ( रा. १०.२२७ ) मोगरी.
**एला०** ( रा. ६.७० ) एक प्रकारची वेलची. वेलदोडा.

**कुमारी**–स्त्री., ( रा. ३.२७४ ) वांझकटोली.

**–वर्ति**–स्त्री., योग० **हरीतक्यादिनिर्मिता एषा वर्तिः सर्वश्लेष्माक्षिरोगघ्नी** ( असंउ. १९ )
एक औषधि योग. हिरडा इत्यादी औषधाची ही कांडी डोळ्याचे सर्व कफज रोग नाशक आहे.

**कुमुद्**–न., वनस्पति० **पद्मभेदः, मूत्रविरजनीयगणे एकं द्रव्यम्** । ( चसू. ४.१५ ( ३४ ) **श्वेतकमलम्, उत्पलादिगणे** ( सुसू. ३८.५२ सुसू. १३.१४ ) **असृक्प्रशांतिकरं श्वेतकमलम्** ( सुउ. ४०.१२१ ) **संग्रहणीयरक्तपित्तप्रशमनानां श्रेष्ठम्** ( असंसू. १३.३ ) **चन्द्रोदयविकासि उत्पलं, शाकत्वेनोपयुज्यते । पुष्पशाकगुणाः–मधुरं, पिच्छिलं, स्निग्धं, ह्लादि, शीतलं च,** ( सुसू. ४६.२८५ ) **कुमुदगुणाः–स्वादु, पाके तिक्तं, शीतलं, कफापहं, रक्तदोषहरं दाहश्रमपित्तप्रशान्तिकृत्** ॥ ( ध. ४.१५५ ) "**नीलोत्पलमतिस्वादु शीतं सुरभिसौख्यकृत् । पाके तु तिक्तमत्यन्तं रक्तपित्तापहारकम्**" ॥ ( रा. १०.२४९ )
हिं.–छोटा कंवल, नीलोफर.
म.–**कृष्णकमळ.**
गु.–नीलोपल.
बं.–शालुक.
त.–वेलम्बल.
एक वनस्पती. कमळाचा प्रकार. मूत्रातील दोषनाशक गणातील एक. ( पांढरे कमळ ). मळाचा संग्रह व रक्तस्राव ( रक्तपित्ताचा ) कमी करणाऱ्या द्रव्यात श्रेष्ठ. रक्तदोषनाशक पांढरे कमळ. चंद्रोदयाबरोबर फुलणारे निळे कमळ. भाजी म्हणून उपयुक्त. या फूल भाजीचे **गुण**–गोड, बुळबुळीत स्निग्ध, आनंददायक, थंड. धन्वंतरिनिघंटूतले **कुमुदाचे गुण**– रक्तदोषहर, कफनाशक, रक्तदोषनाशक, दाह, पित्त, थकवा कमी करणारे, वरचे गुण आहेतच. निळे कमळही सुगंधि व वरच्या गुणाचे, पाककाळी अति कडु.
**भैषज्य० कर्पूरः** ( रा. १२.५६ ) एक औषध. कापूर.

**( कुमुदा )**–स्त्री., कीट० **वायुरोगदा वायवी लूता, दंशलक्षणानि–दाहः, स्फोटः, स्फुरणं, तोदः, पिच्छिलक्लेदविस्रावः, श्वासो, गलग्रहश्च** ( असंउ. ४५, )
वातगुणी लूता नावाचा विषारी किडा. ह्याच्या दंशाने दाह, फोड येणे, स्फुरण, टोचणी, बुळबुळित स्राव येणे, श्वास, व गळा जखडणे हे उपद्रव होतात.
**वनस्पति० काश्मरी** ( रा. ९.१४७ )
शिवण.
**शालिपर्णी** ( रा. ४.११३ ) सालवण.
**धातकी** ( रा. ६.१५२ ) धायटी.
**कट्फलः** ( ध. १.७३ ) कायफळ.
**पृश्निपर्णी** ( ध. १.९१ ) पिठवण.

**( कुमुदी )**–स्त्री., मूषा ( र. १०.१ ) मूस.

**–किञ्जल्क**–पु., **कुमुदस्य बिसम् । सांग्राहिकरक्तपित्तप्रशमनानां श्रेष्ठम्** ( असंसू. १३.३ ) ( चसू. २५.४० )
कमळातील केशर. मलस्तंभक व रक्तपित्ताचा रक्तस्राव कमी करणाऱ्या द्रव्यात श्रेष्ठ.

**–गन्धिनी**–स्त्री., वनस्पति० **त्रिवृद्भेदः** ( ध. १.२४५ )
तेडाचा एक प्रकार.

**–घ्नी**–स्त्री., क्षीरविष० **स्थावरविषभेदः, यस्य क्षीरं विषमयं भवति** । ( सुक. २.५ )
एक विषारी दूध. ज्या वनस्पतीचे दूध विषारी असते ती.

**–नाल**–पु., शाक० **इदं स्वादुकषायं शीतं कफमारुतकोपनं च** ( चसू. २७.११७ )
एक शाकभाजी. ही गोड, तुरट, थंड, कफवातप्रकोपक आहे.

**–बान्धव**–पु., **चन्द्रः** ( र. २७.५८ ) चंद्र.

**–राज्य**–न., **कुरुक्षेत्राद्दक्षिणस्यां दिशि स्थितः कश्चन देश०** ( काखि. २५.१३ )
कुरुक्षेत्राच्या दक्षिणेस असलेला एक देश.

**कुमुदिनी**–स्त्री., वनस्पति० **कुमुदम्** ( रा. १०.२५० )
कमळाचा एक प्रकार.

**कुमुदोत्पल**–न., वनस्पति० **श्वेतोत्पलम्, पित्तसंशमनवर्गे एकं द्रव्यम्** ( सुसू. ३९.८ )
पांढरे कमळ. पित्तशामक वर्गातील एक द्रव्य.

**कुमुद्वती**–स्त्री., स्थावरविष० **क्षीरविषा, फलविषा च** ( असंउ. ४०. सुक. २.५ )
एक विषारी वनस्पती. हिचे दूध व फळ विषारी.
**पद्मिनी** ( ध. ४.१५७ )
एक वनस्पती. कमळाची वेल.
**कुमुदम्** ( रा. १०.२५० ) चंद्रविकासी कमळ.

**कुम्भ**–पु., दृढावयवोऽल्पमुखो घटः, कलशः
(चसू. १५.७) (सुसू. ११.११)
लहान तोंडाचा बळकट घडा. कळशी.
**मान० द्रोणद्वयं, शूर्पपर्यायः** (चक. १२.९६)
(चचि. १.७६)
एक माप. दोन द्रोण. द्रोण म्हणजे आदमणी. १⁄१६ खंडी. ३२ शेर. (८० तोळे=१ शेर.)
**वनस्पति० जेपालः** (र. २९.५६)
पु., न., त्रिवृत् (अहृसू. १५.२) जेपाळ, तेड.
**रोग० कुम्भकामला** (सुउ. ४४.६) एक रोग.

**–कामला**–स्त्री., **रोग० कामलारोगप्रकारः, कुम्भः कोष्ठस्तदाश्रया कामला, कुम्भकामला**
(चचि. १६.३७)
**पाण्डुरोगी योऽत्यर्थं पित्तलानि निषेवते, तस्य पित्त-मसृङ्मांसं दग्ध्वा कामलारोगाय कल्पते। हारिद्र-नेत्रो हारिद्रत्वङ्नखाऽननो रक्तपीतशकृन्मूत्रो भेक-वर्णो, हतेन्द्रियशक्तिः, दाहाविपाकदौर्बल्यसदना-रुचिकर्षितः, इत्येवं लक्षणः स भवति। एषा कोष्ठशाखाश्रया कामला मता। कालान्तरात् सा एव कृच्छ्रसाध्या कुम्भकामला भवति**
(मा; सुउ. ४४.६)
काविळीचा प्रकार. कुंभ म्हणजे कोठा. कोठ्यात होणारी कावीळ. पांडुरोगी जेव्हा अतिशय पित्तकर पदार्थ सेवन करतो, त्याचे पित्त प्रकुपित होऊन रक्त मांस या धातूंना जाळून (दुष्ट करून) हा रोग करते. **लक्षणे**–डोळे, त्वचा, नखे व तोंड पिवळी होतात. मल, मूत्र ही पिवळी व लाल. रोगी पिवळ्या बेडकासारखा दिसतो. दाह, अपचन, दुर्बलता, अंग गळणे, रुचि नसणे इत्यादी लक्षणे त्याला होतात. हिला कोष्ठशाखाश्रयी कामला म्हणतात. कालांतराने हीच कष्टाने साध्य होणारी कुंभकामला होते.

**–कारिका**–स्त्री., **वनस्पति० कुलत्था** (रापरि. ५.१९)
रानकुळीथ.

**–कारी**–स्त्री., **वनस्पति० कुलत्थिका** (ध. ३.१५६)
कुळीथ.

**–तुम्बी**–स्त्री., **वनस्पति० अलाम्बुनीविशेषः, गुणाः– मधुरा, शिशिरा, पित्तहारिणी, गुरुः, सन्तर्पिणी, रुच्या, वीर्यपुष्टिबलप्रदा च** (रा. ७.२३६)
एक प्रकारचा भोपळा. **गुण**–गोड, थंड, पित्तनाशक, जड, पौष्टिक, रुचकर आणि वीर्यवृद्धि व बलदायक.



**–फला**–स्त्री., **वनस्पति० कूष्माण्डिका** (ध. १.१८३)
कोहोळा, भुरा कोहळा.

**–बीजक**–पु., **वनस्पति० रीठाकरञ्जः** (रा. ९.१८६)
रीठा.

**–योनि**–पु., **वनस्पति० अगस्त्यः** (असंउ. १६)
हदगा.
**द्रोणपुष्पी** (रापरि. ५.४८) द्रोणपुष्पी. कुंभा.

**–सर्पिस्**–न., **एकादशशतं वत्सरानुषितं घृतम्। एतद् रक्षोघ्नं स्यात्, द्र० 'घृत'** (सुसू. ४५.१०९)
अकराशे वर्षांचे जुने तूप. हे जंतुघ्न असते.

**कुम्भक**–पु., **मान० द्रोणः। चतुराढकं चतुर्विंशत्यधिक-सहस्रतोलकं वा मानम्** (र. ११.८)
एक वजन. द्रोण. एक हजार चोवीस तोळे.

**कुम्भसाह्व**–पु., **रोग० कुम्भकामला** (सुउ. ४४.११)
एक रोग. कुंभकामला, कोठ्यातील कावीळ.

**कुम्भसी**–स्त्री., **वनस्पति० मृगाक्षी** (रा. ७.२५८)
कडू व तिखट काकडी प्रकार.

**कुम्भाण्डी**–स्त्री., **वनस्पति० कूष्माण्डम्** (रा. ७.२६९)
कोहळा.

**कुम्भालाम्बु**–स्त्री., **वनस्पति० कुम्भतुम्बी** (रा. ७.२३६)
गोल भोपळा.

**कुम्भाह्वय**–पु., **रोग० पाण्डुरोगभेदः, कुम्भकामला** (सुउ. ४४.६) पांडुरोगाचा एक प्रकार.
कुंभकामला. कोठ्यातील कावीळ.

**(कुम्भिका)**–स्त्री., **गुह्यरोग० रक्तपित्तोत्था, जाम्बवा-स्थिनिभा आशुजा पिटिका** (असंउ. ३८)
एक गुप्तरोग. रक्त व पित्तापासून जांभळाच्या अठळी सारखी अति शीघ्र होणारी पुळी.
**पाटला** (सुउ. ३२.७-४०.१५४) (ध. १.१२०)
पाडळ, पाडळी.
**स्वेद०, द्र० 'कुम्भीस्वेद'** (चसू. १४.३९)
घाम काढण्याचा एक प्रकार. पहा 'कुम्भीस्वेद.'

**(कुम्भी)**–स्त्री., **वनस्पति० कट्फलः** (र. ११.९०-९२)
* कायफळ.
**दन्ती** (रा. ६.३३९) दांती.
**कुम्भीरः** (असंचि. ६.) पाडळ, कुंभी.

**कुम्भी**–स्त्री., **वनस्पति० कट्फलः** (असंचि. ६)
कायफळ.
**दन्ती** (असंचि. ६) दांती.
**कुम्भीरः** (असंचि. ६) सागरगोटा.

**–पुट**–न., **गजपुटम्** (र. १६.१३०) गजपुट.

**–मद**–पु., हस्तिमदः ( रापरि. ६.२० )
हत्तीचा मद.

**कुम्भिनीफल**–न., वनस्पति० जेपालबीजम्
( ध. १.२२८ ) जयपाळाचे बी.
**भूपाटली** ( असंचि. ६ ) भूपाडळ. पाडळ. पाडळी.

**कुम्भिन्**–पु., अग्निप्रकृतिककीट०
( सुक. ८.९ ) ( असंउ. ४३ )
एक अग्निस्वभावी किडा.

**कुम्भी**–स्त्री., वनस्पति० दन्ती ( रा. ६.३३९ )
दांती.
**भूपाटली** ( रा. ५.४३ ) भुईपाडळ.
**पाटलाभेदः स्थलकुम्भी** ( सुउ. ५९.१७ ) द्र० '**पाटला**' भुईपाडळ. पहा 'पाटला'.
**कट्फलः जलकुम्भी** ( रा. ११.९० ) कायफळ.
**जेपालबीजम्** ( र. १२.१२९ ) जयपाळ बी.
**वनस्पति० कुम्भीक इति ख्याता** ( चवि. ८.१४४ )
उंडीण, जलकुंभी.
**वर्त्मरोग० पित्तेनान्तर्वर्त्मनिकुम्भीकबीजवद्वाह्या पिटकाः आध्मायन्ते भिद्यन्ते च । कुम्भीपिडका**
( असंउ. ११ )
पापणीचा एक रोग. रांजणवाडी. पित्ताने पापणीच्या आत डाळिंबाच्या बीच्या आकाराच्या किंवा उंडिणीच्या बियांच्या आकाराच्या पुळ्या होतात. त्या फुगतात, फुटतात.
**महाघटः** ( चचि. २८.१११ )
मोठा घडा, घागर.
**स्थालिः, सच्छिद्रा घटिका, स्वेदनार्थं यन्त्रम्**
( अहसू. १७.१० )
थाळी, छिद्रे असलेली घटिका. वाफेचे यंत्र. घाम काढण्यास उपयोगी यंत्र.
**क्षुद्रकुम्भः** ( सुचि. ३२.५ ) कळशी.

**–फल**–न., वनस्पति० कट्फलः ( र. ४.६८ )
कायफळ.
**जेपालम्** ( र. ४.६८ ) जयपाळ.

**–बाष्प**–पु.,न., कुम्भीस्वेदः ( अहसू. १९.४१ )
**द्रष्टव्यं 'कुम्भीस्वेद.'**
घाम काढण्याचा एक प्रकार. पहा. 'कुम्भीस्वेद'.

**–बीज**–न., वनस्पति० जेपालम् ( ध. १.२२८ )
जयपाळ बी.

**–मुख**–पु., दुष्टव्रणस्य प्रकारः ( चचि. २५.२५ )
दुष्टव्रणाचा एक प्रकार.

**–स्वेद**–पु., स्वेद०, आनूपोदकमांस–वातघ्नद्रव्य-क्वाथपूर्णां कुम्भीं कृत्वा भूमौ निखन्य तदुपरि शय्यां संस्थाप्य अग्निसंतप्त–लौहपाषाणादीन् क्वाथे निक्षिप्य तदुत्पन्नबाष्पैश्च गात्रं स्वेदयेत् । अन्ये वातहरादिद्रव्यपूर्णां सजलां कुम्भीं कृत्वा बाष्पान् गृह्णीयात् ( सु. उ. ३८.२२ ) स्वेदद्रव्याणि कुम्भ्या-मुत्क्वाथ्योपश्लिष्योपविष्टस्तद्वदूष्माणं गृह्णीयात् । भूमौ वा निखाय तदूर्ध्वमासनं शयनं वा नाति-घनप्रच्छदं परितः प्रलम्बमानकुथाकम्बलगोणिकं निधाय तत्रस्थस्योष्माणं गृह्णतः कुम्भ्यामग्निवर्णा-नयोगुडानुपलांश्च शनैर्निमज्जयेदिति कुम्भीस्वेदः
( असंसू. २६. चसू. १४.३९ )
घाम काढण्याचा एक प्रकार. झाडी व पाणी मुबलक असलेल्या भागात राहत असलेल्या प्राण्यांचे मांस तसेच वातनाशक द्रव्ये यांचा काढा एका घड्यात घालून तो जमिनीत खड्डा करून त्यात ठेवावा. त्यावर खाट टाकून रोग्यास तिच्यावर ठेवावे. दगड, लोखंडाचे गोळे विस्तवांत लाल करून त्या घड्यातील काढ्यात टाकावेत व अवयवाला वाफ द्यावी. काहींच्या मताने वातहर वनस्पतींच्या काढ्यानेच वाफ द्यावी. अष्टांगसंग्रहांत थोड्या फरकाने हीच कल्पना आहे.

**कुम्भीक**–पु., वनस्पति० स्थलकुम्भिका
( सुचि. १७.२७ ) उंडीण.
**प्रियङ्ग्वादिगणे वनस्पति० श्लक्ष्णत्वक्को रोमशः कुम्भी नाम वृक्षो यस्य त्वग् वस्त्राकारा भवति**
( सुसू. ३८.४५ )
प्रियङ्ग्वादि गणातील एक वनस्पती. गुळगुळीत साल असलेला वर केसांसारखे धागे असलेला या नावाचा वृक्ष. याची साल कापडासारखी असते.
**पाटला** ( सुसू. ३८.४५ ) पाडळ.
**स्वल्पविटपः** ( सुसू. ३८.४५ ) लहान झुडुप.

**( कुम्भीका )**–स्त्री., रोग० शूकरोगः, लक्षणम्–रक्त-पित्तोत्था जाम्बवास्थिनिभा कृष्णा कुम्भीफलवच्च कुम्भीका ज्ञेया भेद्यरोगोऽयम्
( सुनि. १४.६ सुसू. २५.७ )
एक गुप्त रोग. जननेंद्रियावर रक्त व पित्तदुष्टीमुळे जांभळाच्या बियासारख्या काळ्या व उंडिणीच्या बीसारख्या पुळ्या होतात. हा रोग शस्त्राने भेद करूनच बरा करावा लागतो.

नेत्ररोग० नेत्रवर्त्मगतः पिडकास्वरूपः, द्र० 'कुम्भीकपिडका' (सुउ १.४२. ३.१०)
डोळ्याच्या पापणीला होणारी पुळी. पहा 'कुम्भीकपिडका.'
वनस्पति० कट्फलः (ध. १.७३)
कायफळ.

**–पिडका**–स्त्री., वर्त्मरोग० नेत्रवर्त्मनि कुम्भीकबीजप्रतिमाः पिडकाः, कुम्भीका इति व्यपदिष्टाः (सुउ ३.१०)
पापणीचा विकार. डोळ्याच्या पापणीत बारीक पुळ्या होतात.

**–बीज**–न., कुम्भीका स्थलकुम्भी, तद्बीजं दाडिमफलबीजाकारम् (सुउ. ३.१०) उंडिणीचे बी.

**–षण्ड**–पु., जातजरोग० कुम्भीकनामा सरेताः षण्डः। गुदयोनिः, कुम्भिलः इति अपरपर्यायौ यः पुरुषः स्वे गुदे स्वकीयपायौ, अब्रह्मचर्यात् अन्यपुरुषात् व्यवायं कारयित्वा पश्चात् स्त्रीषु विषये पुमानिव प्रवर्तते पुरुषवद्व्यवायं करोति, स कुम्भीकनामा षण्डो ज्ञेयः। अन्ये तु प्रथमं स्त्रीषु विषये तासामेव गुदविवरे पशुवत् पृष्ठभागे शिथिलेन एव मेहनेन प्रवर्तते। किंनिमित्तमेतदित्याह अब्रह्मचर्यात् क्लैब्यात् संजातशुक्रस्याऽप्रवृत्तित्वात्। ततश्च अन्यथा विप्रकृत्या ध्वजोच्छ्राये संजाते स एव स्त्रीषु पुरुषवत् प्रवर्तते स कुम्भीकनामा नपुंसकभेदः। गुदयोनिरयम्। अस्योत्पत्तिहेतुस्तन्त्रान्तरे वर्णितः। यथा–"मातुर्व्यवायप्रतिघेन वक्री स्याद्बीजदौर्बल्यतया पितुश्च।" गयी तु कुम्भीकोत्पत्तिहेतौ काश्यपोक्तं श्लोकमाह। यथा–"अरजस्कां यदा नारीं श्लेष्मरेता व्रजेद्दतौ। अन्यसक्ता भवेत् प्रीतिर्जायते कुम्भिलस्तदा" इति (सुशा. २.४०)
नपुंसकाचा एक प्रकार. जन्मतः आलेला विकार. याला शुक्र असते. गुदयोनी व कुंभील असेही याला म्हणतात. प्रथम दुसऱ्या पुरुषाकडून आपल्या गुदात मैथुन करवून नंतर स्त्रीशी संभोग करण्यास समर्थ होतो, संभोग करतो तो षंढ. अन्यमत–ज्या स्त्रीशी संभोग करावयाचा तिच्याच गुदद्वारात ताठ न झालेल्या इंद्रियानेच पशूप्रमाणे प्रथम मैथुनास प्रवृत्त होतो तो. हे असे का? तर ब्रह्मचर्याचे पालन न केल्यामुळे निर्माण झालेल्या शुक्राच्या अप्रवृत्तीमुळे व नपुंसकत्वामुळे होय. वरीलप्रमाणे गुदप्रवृत्तीमुळे शिश्न ताठ झाल्यावर स्त्रीच्या योनीशी संभोग करतो तो. अन्यग्रंथातील मत–स्त्रीने मैथुनास विरोध दर्शविल्यामुळे व पतीचे शुक्रबीज निर्बल असल्यामुळे मैथुन होऊन गर्भ राहिल्यास तो अशा प्रकारचा षंढ होतो. दुसरे मत–परपुरुषावर आसक्त स्त्री रजःस्राव नसतां ऋतुकाळी कफस्वभावी शुक्र असलेल्या पुरुषाच्या समागमाने असा कुंभिल षंढ गर्भ होतो.

**–षण्ढ**–पु., कुम्भीकषण्ड (सुशा. २.४०)
पहा 'कुम्भीक षण्ड'

**कुम्भीका**–स्त्री., (सुसू. २५.७) एक रोग.

**–चिकित्सा**–स्त्री., कुम्भीकायाः प्रतिदिनं नाडीस्वेदेन स्वेदनं कार्यम्। सुस्निग्धैः सुखोष्णैरुपनाहैश्च कुम्भिकामुपनाहयेत्। अनया रीत्या यदा सा ग्रन्थिः पक्वतां गच्छेत्तदा तस्या भेदनं करणीयम्। शुद्धायां सत्यां तस्या रोपणार्थं त्रिफला-लोध्र-तिन्दुकाऽऽम्रातक-सिद्धतैलस्योपयोगः कार्यः (सुचि. २१.५)
उपचार–कुंभीकेला दररोज नळीतून वाफ सोडून तिच्याने शेकावे. चांगलेच स्निग्ध व बरे वाटेल इतके गरम अशा पोटीसाने शेकावे व ती गांठ पिकली की फोडावी. पू काढून टाकल्यावर जखम भरून आणण्याकरिता त्रिफळा, लोध्र, टेंभुरणी, आंबाडा यांनी सिद्ध केलेल्या तेलाचा उपयोग करावा.

**कुम्भीकिनी**–स्त्री., रोग० कुम्भिका, नेत्रवर्त्माश्रयो नेत्ररोगः (सुउ. १३.१६)
डोळ्याच्या पापणीचा एक रोग.

**कुम्भीनस**–पु., कीट० वायव्यः पवनकोपनः वातजरोगान् करोति (सुक. ८.५ असंउ. ४३)
एक वातवर्धक व विषारी किडा. वातरोगकर.

**कुम्भीर**–पु., जलचर० अस्य वसा मत्स्यवसास्वहिततमा (चसू. २५.३९)
घडीयालः महानक्रसदृशो जलचरप्राण्यौपादिष्वेकः (सुसू. ४६.१०९)
कुम्भिनं हस्तिनमपीरयति इति कुम्भीरः। वारिशयप्राणि० (सुसू. २७.४०)
बं.—हांगर.
म.—मगर.
जलात राहाणारा एक प्राणी; मगर. याची चरबी माश्यांच्या चरबीच्या गुणाच्या दृष्टीने सर्वस्वी अहितकर. घडियाल या नावाचा मोठ्या मगरा-

सारखा पाण्यात राहणारा. पाय असलेला हा प्राणी कुम्भीला म्हणजे हत्तीला देखील ईरयति म्हणजे हालवतो, खेचतो म्हणून तो कुंभीर.

**वनस्पति० गुणाः–कटुः कषायोष्णो ग्राही वातकफाऽपहः** ( रापरि. ९.१९ अहसू. ६.५२ )

गुण–तिखट, तुरट, उष्ण, मळ बांधणारी, वातकफनाशक.

**कुयष्टिक**–पु., प्रतुदपक्षि० ( असंसू. ७.७४ )

**द्र० 'प्रतुद'**

भक्ष्य टोचून टोचून खाणारा एक पक्षी.

**कुरङ्ग**–पु., **जङ्घालवर्गे पशु०, हरिणभेदः, चतुरगतिः, न कृष्णो न ताम्रश्चतुरङ्ग इति लोके, चतुःशृङ्गो भेदुलापतिः**

( सुसू. ४६.५७ ३३३. सुउ. ३९.१५३ )

**सर्वप्राणिनामाहारार्थं हितमस्य मांसम्**

( सुसू. २०.५ )

**अस्य मांसरसो गर्भस्थापनार्थमुपयुक्तः**

( चशा. ८.२४ )

जंघाल वर्गातील एक पशु. हरिण प्रकार–चपळ प्राणी. काळा नाही तांबडा नाही अशा रंगाचा. चतुरंग, चतुःशृङ्ग, भेदुलापति असेही त्याला म्हणतात. याचे मांस सर्वांना हितकर. गर्भस्राव, गर्भपात होत असेल तर किंवा गर्भ रहात नसेल तर याच्या मांसाचा रस उपयुक्त.

**–नाभी**–स्त्री., **भैषज्य० कस्तूरिका** ( रा. १२.४७ )

एक औषध. कस्तुरी.

**कुरङ्गिका**–स्त्री., वनस्पति० **मुद्गपर्णी** ( रा. ३.१७४ )

रानमूग.

**कुरण्ट**–पु., वनस्पति० **सुनिषण्णकः, शितिवारकः** ( अहसू. १५.२४ ) कुरडू.

**कुरण्टकः** ( रा. १०.४१९ )

**कुरण्टक**–पु., वनस्पति० **सहचरभेदः पीतसहचरः**

( र. ११.९१ )

**सहचरपुष्पशाकगुणाः–रक्तपित्तघ्नम्**

( सुसू. ४६.२८८ )

**विसर्पचिकित्सायामालेपनार्थमुपयुक्तम्**

( चचि. २१.८९ )

**गुणाः–तिक्तो हिमः शोफतृष्णाविदाहनुत् । केश्यो वृष्यो बल्यः त्रिदोषशमनश्च ॥** ( ध. १.२७९ )

हिं.—कांटसरेया.

म.—**पिवळा कोरांटा.**

गु.—कांटा शेरिओ.

त.—शेमुळी.

पिवळी कोरांटी. **फूलभाजीचे गुण**–रक्तपित्तरोगनाशक, धावऱ्यावर लेप करण्याला उपयुक्त. कडु, थंड, सूज, तहान, छातीतली जळजळ नाहीशी करते. केसाना चांगली, शुक्रवर्धक बलवर्धक व त्रिदोषशामक.

**( कुरण्टिका )**–स्त्री., **वनस्पति० कृष्णसूक्ष्मफलः क्षुपः वीरतर्वादिगणे पठितः** ( सुसू. ३८.१२ )

वीरतर्वादि गणातील एक वनस्पती. बारीक काळ्या-रंगाच्या फळाचे झुडुप.

**वनस्पति० अम्लानसदृशपत्रकुसुमा हरितपुष्पा । अन्ये कुनालिकाकुरण्टिके उत्तरापथजे इत्याहुः । पत्रगुणाः–स्वादुपाकरसं, लवणानुरसं, शीतं, कफघ्नं, नातिपित्तलं च** ( सुसू. ४६.२७४–७५ )

कोरांटीच्या पानाफुलांसारखी पाने फुले पण हिरव्या रंगाची फुले असलेली. **पानांचे गुण**–रस व पाक गोड, मागाहून खारट चवीचे, थंड, कफनाशक, थोडे पित्त वाढविणारे.

**कुरव**–पु., **वनस्पति० कुरबकः** ( र. २५.५२ )

तांबडी कोरांटी.

**कफजकृमि०** ( असंनि. १४.५२ )

एका जातीचा कफज कृमी.

**( कुरवी )**–स्त्री., **वनस्पति– सैंहली–पिप्पली**

( रा. ६.१२० ) सिंहलीपिंपळी.

**कुरबक**–पु., वनस्पति० **श्वेतमन्दारकः**

( रा. १०.३१; सुक. ५.८६ )

पांढरी रुई, मांदार.

**वनस्पति० रक्तसहचरः** ( र. २९.८९ असंसू. ३४.२८ ) **गुणाः–कटुरुष्णो वातामयशोफनाशनो ज्वरनुदाध्मानशूलकासश्वासार्तिप्रशमनो वर्ण्यश्च**

( रा. १०.४१४ )

तांबडी कोरांटी. **गुण**–तिखट, उष्ण, वातविकार, सूज, ज्वर, पोटफुगी, शूळ, खोकला, श्वासनाशक आणि वर्ण चांगला करणारी.

**शालिषष्टिकभेदः, द्र० 'षष्टिक'** ( सुसू. ४६.८ )

भाताचा प्रकार. लालफुलाचे भात. पहा 'षष्टिक'

**–नाम्नी**–स्त्री., वनस्पति० **कुरबकः** ( रा. १०.४१९ )

तांबडी कोऱ्हांटी.

**कुरम्बा**–स्त्री., वनस्पति० द्रोणपुष्पी ( रापरि. ५.४८ )
कुंभा.

**कुरम्बिका**–स्त्री., वनस्पति०, द्रोणपुष्पी
( रापरि. ५.४८ ) कुंभा.

**कुरर**–पु., पक्षि० प्रसहजातीयोऽयम् ( चसू. २७.३७ )
" कुरेति शब्दं राति कुरति शब्दं करोति " कुरशब्दे तुदादौ " अस्य रोमाणि श्वासे उपयुक्तानि
( चचि. १७.११८ )
किडे किंवा पक्षी यांना पराभूत करून खाणारा पक्षी. 'कुर' असा शब्द करणारा. याचे केस श्वासावर उपयुक्त. क्रौंचपक्षी. कुरर.
चिल्ल्याकारो नादोत्थापितमत्स्यो हस्तमत्स्यग्राही, अरुणः, श्वेतमस्तको, मत्स्यग्राही च
( सुसू. ४६.७४; सुसू. ४६.१०५ )
चिल्लीच्या आकाराचा मासा. अरुणादि तीन नावे आहेत. नावे गुणबोधक आहेत.
प्लवजातीयः पक्षी ( सुसू. ४६.१०५ )
पाण्यावर तरंगणारा–पोहणारा पक्षी.
कङ्कमलसदृशजलचरः पक्षी ( सुसू. ४६.१०५ )
कंकमल पक्ष्यासारखा पाण्यात रहाणारा पक्षी.

**–मुख**–न., स्वस्तिकयन्त्र० ( सुसू. ७.१० )
द्र० " यन्त्र "
स्वस्तिक यंत्रांपैकी एक.

**कुरराङ्घ्रि**–पु., वनस्पति० देवसर्षपकः
( रापरि. ९.४३ ) देवमोहरी.

**कुरी**–स्त्री., तृणधान्य० गुणाः–हरितं तन्मधुरं बलप्रदञ्च । तदेव पक्वं वाजिनां पुष्टिकृत् ( रा. १६.१७९ )
एक तृण धान्य. **गुण**–कच्चे गोड, व बलप्रद. पक्के, घोड्यांना–पौष्टिक.

**कुरु**–पु., देश० ( सुचि. २९.१७ ) एक देश.

**–क्षेत्र**–न., मध्यदेशाद्योजनशतं परं कुरुक्षेत्रं देशविशेषो वर्तते ( काखिल. २५.५ )
एक देश. मध्य देशापासून चारशे कोस लांब असलेला देश.

**कुरुट**–पु., वनस्पति० शितिवारः ( रा. ४.२०७ )
कुरडू.

**कुरुण्टक**–पु., वनस्पति० कुरुण्टकः ( सुसू. ३८.६ )
कोरांटी, सिंहपिंपळी.

**( कुरुण्टिका )**–स्त्री., वनस्पति० कुरण्टिका, शरबालिकाभेदो, लोहितपुष्पः ( सुचि. ७.१० )
शरबालिका प्रकार, लालफुलाची.

**कुरुण्ड**–पु., वनस्पति० साकुरुण्डः ( रापरि. ६.१६ )
आक्रोड.

**कुरुबक**–पु., वनस्पति० कुरबकः ( सुसू. ४२.११ )
तांबडी कोरांटी.

**कुरुबकाकृति**–वि., शलाका० रक्तसहचरपुष्पमुकुलाकारा, तथा लिङ्गनाशं कफोत्थपटलसंज्ञं विध्येत्
( अहृसू. २६.१३ )
एक सळईयंत्र. तांबड्या कोरांटीच्या फुलाच्या कळीच्या आकाराची. तिच्याने मोतीबिंदू काढतात.

**कुरुबाहु**–पु., पक्षि० विष्किरजातीयः नीलग्रीवो रक्तशिखः श्वेतपक्षः ( अहृसू. ६.४४ )
उकरून भक्ष्य वेचणारा एक पक्षी. तांबडा तुरा निळी मान असलेला पांढरा पक्षी.

**कुरुवाहक**–पु., पक्षि० कुरुकुरुकः विष्किरेष्वेकः
( सुसू. ४६.५९ )
उकरून भक्ष्य वेचणारा एक पक्षी.

**कुरुविन्द**–न., लवण० काचलवणम् ( रा. ६.४५ )
एक मीठ. काचलवण.
पु., मणि० पद्मरागो,' निशानोपल ' इत्यन्ये, लेखनचूर्णाञ्जनघटकद्रव्यम् ( सुउ. १५.२५ ) लोहितरत्नम्, व्रणेषूत्सन्नमांसेष्ववसादने प्रशस्तम्
( सुसू. ३७.३१–३२ )
माणिक्यम् ( र. ४.७ )
पद्मराग मणी. लेखन करणाऱ्या चूर्ण स्वरूपाच्या अंजनातील एक घटक द्रव्य. एक तांबडे रत्न. माणिक. व्रणातील मांस त्वचेच्याही वर उचलून आले तर ते कमी करण्यास चांगले.
कुधान्य० व्रीहिगुरुः ( ड० ) कोरदूषकादिकुधान्यवर्गे पठितः ( सुसू. ४६.२१ ) कुरुक्षेत्रजव्रीहिभेदः
( चसू. २७.१४ )
तांदुळाचा एक प्रकार. कोद्रु इत्यादी कुधान्य वर्गातले. कुरुक्षेत्रात होणारा व्रीहि जातीचा एक तांदूळ.
वनस्पति० मुस्ता ( सुक. ३.१४ ) नागरमोथा.
माषः ( ध. ६.९९ ) उडीद.
पाषाण० येन निशितानि लोहानि तीक्ष्णानि भवन्ति, अनुशस्त्रेष्वेकः ( सुसू. ८.१५ )
एक कडक दगड, ज्याच्यावर शस्त्रे घासली असता धार लागते. एक अनुशस्त्र. कुरुंद. कुरुंदाचे जाते प्रचारात आहे.

**कुरुविन्दक**–पु., वनस्पति० मुस्ता ( ध. १.४० )
नागरमोथा.

**कुरुवीरक**–पु., वनस्पति० अर्जुनः ( रा. ९.१९२ )
अर्जुनसादडा.

**कुरूटक**–पु., वनस्पति० शितिवारः ( अहृसू. ६.९३ )
कुरडू.

**कुर्कुटी**–स्त्री., वनस्पति० शाल्मली ( र. २०.२६ )
**बन्दाल कुकुन्दर** ( र. २०.२६ )
**( इति अम्बिकादत्तशास्त्री )** ( र. २०.२६ )
सावर.

**कुर्द्द**–पु., वायव्यः कीट० ( असंउ. ४३ )
एक वातप्रकृतीचा किडा.

**कुलक**–पु., न., पटोलः ( ध. १.४९ )
( चचि. २६.१५६ काखिल० १३.४५ )
पडवळ.
**कारवेल्लकः** ( चचि. २७.२७ ) कारले.
पु., **मूषिकः एतद्विषतो रुजा, स्रावो दंशमण्डले राजयश्च** ( असंउ. ४६ )
एक उंदीर. याच्या विषाने वेदना, स्राव, चकंदळे आणि लाल रंगाच्या रेषा उमटतात.

**–कर्कटी**–स्त्री.. वनस्पति० **चीणाकर्कटी**
( रा. ७.२६० ) लांब असणारी एक काकडी.

**कुलक्षयकरी**–स्त्री., **रेवतीग्रह० सा असाध्या जातहारिणी** ( का–रेवतीकल्प. ५० )
रेवती ग्रहाचा एक प्रकार. जन्मतः मूल मारणारी. असाध्य आहे.

**कुलजविकार**–पु., **पितृपितामहादिकारणोद्भूतो रोगः कुलविकाराः सर्वेऽसाध्याः** ( चचि ६.५७ )
बाप आजा यांच्याकडून त्याना असलेला रोग मुलात येणे. हे सर्व असाध्य.

**कुलञ्ज**–पु., **वनस्पति० गुणाः–कटुः तिक्तः उष्णो दीपनो मुखदोषनुत्** ( रापरि. ६.११ )
हिं.—कुलिंजन. कोष्ठकुलींजन.
म.—**कोळिंजन.**
गु.—कुलिंजन नानूंकुलिंजन मोटे.
बं.—कुलंजन.
त.—पेरा रट्टै, पेरिआ रेटा.
फा.—खिरद्दारु.
कोलींजन. तिखट, कडु, उष्ण, अग्निदीपक, तोंडाचे दोषनाशक.

**कुलञ्जन**–पु., **वनस्पति० कुलञ्जः** ( रापरि. ६.११ )
पहा ' कुलञ्ज. '

**कुलत्थ**–पु., **शिम्बीधान्य०, ताम्रबीजः, रसतः कषाय उष्णो विपाके कटुः कफमारुतघ्नः, शुक्राश्मरीगुल्मनिषूदनश्च तथैव सांग्राहिकः, पीनसकासहारी च** ( सुसू. ४६.३७ ) **स्वेदोपगगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१३ ( २२ ) **वातामयिनां प्रदेहे उपयुज्यते** ( चसू. ३.१८ ) **कुलत्थो मधुरो रक्तपित्तलो विपाकेऽम्लो विदाही लघुः शोफघ्नश्च** ( असंसू. ७.२८ ) **कासहिक्कार्शःपीडितेभ्यो हितः** ( चसू. २७.२६ ) **आस्थापने प्रयुज्यते** ( चसू. २.१२ ) **आम्लपित्तजननानां श्रेष्ठः**
( चसू. २५.४० )
म.—**हुलगा, कुळीथ.**
गु.—कुळती.
त.—कोल्लु.
बं.—कुलती, कुर्ती–कालाई.
हिं.—कुळथी.
फा.—किल्लन.
कुळीथ. शेंगाचे एक धान्य. लालबीज. तुरट, उष्ण, पाकतिखट, कफवात नाशक. मळ बांधीव करणारा. पडसे, खोकला, गुल्म, शुक्रश्मरी नाशक घाम आणणाऱ्या द्रव्यांना मदत करणारे. वातरोगांना लेप करण्याकरिता उपयुक्त. अम्लपित्त करणाऱ्या द्रव्यात श्रेष्ठ. अ. सं. काराच्या मताने गोड पण आम्लविपाक होणारे, छातीत जळजळ करणारे, रक्तपित्त करणारे, हलके; सूजनाशक; खोकला, उचकी श्वास व मूळव्याधीच्या रोग्यांना हितकर. आस्थापन बस्तीकरिता चांगले.

**–क्षार**–पु., **क्षार० कुलत्थानां भस्म । कृमिघ्नपानादौ घटकं द्रव्यम्** ( सुउ. ५४.३९ )
कुळथाचे भस्म. कृमिघ्न पेय इत्यादीमध्ये घालावयाचे द्रव्य.

**–यूष**–पु., **यूष० कुलत्थयूषगुणाः–अनिलहरः श्वासपीनसनाशनः, तूनी–प्रतूनी–कासाऽर्शो–गुल्मोदावर्तनाशनश्च** ( सुसू. ४६.३७२ )
**दाडिमाद्यम्लसहितः ससैन्धवमरिचोऽयं वातशूलघ्नः** ( सुउ. ४२.९३ )
एक कट. कुळथाचा काढा. वातनाशक, श्वास, पडसे, तूनी–प्रतूनी खोकला, मूळव्याध, गुल्म, पोटफुगी नाहीसे करणारे. आंबट डाळिंब युक्त, सैंधव व मिरी घालून दिल्यास वाताने होणारा शूलनाशक.

**कुलत्थादिघृत**–न., सिद्धघृत० वातिकेऽपस्मारे हितम्, कुलत्थ–यवकोल–शणबीज–पलंकषा–जटिला–दश-मूलं पथ्या चोत्क्वाथ्य बस्तमूत्रेण सह घृतं पचेत्। अत्र मूत्रमेको भागः, क्वाथश्च चतुर्गुणो ग्राह्यः (सुउ. ६१.२८) कुलत्थरसयुक्तं पञ्चकोलशृतं घृतं कफजे कासे हिक्काश्वासे च पाययेत् (चचि. १८.१२९)

कुळीथ इत्यादींनी तयार केलेले तूप. वातज अपस्मारात हितकर. कुळीथ, जव, बोरे, सणाचे बी, रास्ना, जटामांसी, दशमुळे हिरडा यांचा काढा व बकऱ्याचे मूत्र यात तूप शिजवावे, काढा ४ व मूत्र १ भाग. कुळीथ काढा व पंचकोल–(पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक व सुंठ) यात तयार केलेले तूप कफज खोकला, श्वास व उचकीवर चांगले.

**कुलत्थिका**–स्त्री., वनस्पति०, अरण्यकुलत्थिका (सुचि. १६.२६) गुणाः–कषाया, कटुका, शीता, चक्षुष्या, स्थावरजङ्गमविषं हन्ति, अनेकशो नेत्रस्रावान् अपहन्ति विस्फोट–कण्डू–अर्ति–व्रणदोषनिबर्हणीति प्रथिता (ध. ३.१५७; रा. १३.२२०) अरण्य-कुलत्थिका–गुणाः–कटुस्तिक्ता, चक्षुष्या व्रणरोपणी, अर्शः–शूलविबन्धाध्मानशमनी च (रापरि. ५.१९)

रानकुळीथ. गुण–तुरट, तिखट, थंड, डोळ्याला हितकर, स्थावरजंगम विषनाशक, डोळ्यांची अनेक तऱ्हेची गळ, फोड, खाज, वेदना, जखमेतील दोष काढतात. कडु, मूळव्याध, मलावरोध, शूळ, पोटफुगीनाशक.

**कुलपत्र**–पु., वनस्पति० दमनः (रा. १०.१२०) दवणा.

**कुलप्रकृति**–स्त्री., पितृपितामहादिकारणभूता तत्तद् वंश-विशेषगुणयुक्ता शारीरिकी मानसिकी वा प्रकृतिः। सप्तप्रकृतयः–जाति–कुल–देश–काल–वयोबल–प्रत्यात्म–संश्रयाः (असंशा. ८.२२)

कुळाची प्रकृति. बाप, आजा, पणजा इत्यादींचे गुणदोष मुलामध्ये उतरल्यामुळे जी शारीरिक किंवा मानसिक प्रकृति निर्माण होते ती. प्रकृति सात प्रकारची. प्रकार वर आहेत.

**कुलवर्णा**–स्त्री., वनस्पति० त्रिवृत् (रक्तत्रिवृत्) (रा. ६.३६९) लाल तेड.

**कुलहल**–पु., वनस्पति० मुण्डी (सुसू. ३८.१८; अहृसू. १५.३०)

मुंडी; गोरखमुंडी.

वनस्पति० भूकदम्बकः, अलम्बुसाख्यः (अहृसू. १५.३०)

भुईकळंब, लाजाळू, गोरखमुंडी, मंजिष्ठ.

**कुलाल**–पु., कुम्भकारः (र. १०.२८) कुंभार.

**कुलाली**–स्त्री., वनस्पति० कुलत्थिका (ध. ३.१५६)

कुळीथ. पहा 'कुलत्थिका.

**कुलहल**–पु., वनस्पति० मुण्डी, मुण्डितिका (सुसू. ४६.२२१) गोरखमुंडी.

**कुलिङ्ग**–पु., प्रतुदपक्षि० वन्यो ग्राम्यचटकाकारः (सुसू. ४६.६७) वनचटकाकारः पीतमस्तकः (चचि. १८.१४८) तस्य गुणाः–मधुरः, स्निग्धः, कफ-शुक्रविवर्धनः (सुसू. ४६.७१) वृष्यपूपलिका-दियोगे उपयुक्तः (चचि. २(२)११)

भक्ष्य टोंचून टोचून खाणारा पक्षी. गावातल्या चिमण्याच्या आकाराचा रानचिमणा. रानचिमण्या-सारखा पिवळ्या डोक्याचा. **गुण**–गोड, स्निग्ध, कफ व शुक्रवर्धक. शुक्रवर्धक पुऱ्या इत्यादिकांमध्ये उपयुक्त. काकाकुवा, चिमणा.

विष्किरपक्षि० (धपरि. ६.१०)

उकरून भक्ष्य खाणारा एक पक्षी.

वनस्पति० उच्चटाभेदः, शुक्रजननगणे एकं द्रव्यम् (चसू. ४.१२(१९); असंसू. १५.२४)

लव्हाळे, भुई आवळी, गुंज, लसूण, चुका यांपैकी एक. शुक्रोत्पादक गणामधील एक.

मूषिक० दष्टलक्षणानि–दंशः शोफो, दंशमण्डले राज्यश्च (सुक. ७.२०)

एक प्रकारचा उंदीर. **विष लक्षणे**–दंश, सूज, व चकंदळावर रेषा.

**कुलिङ्गाक्षी**–स्त्री., वनस्पति० पेटिका, मधुरस्कन्धे पठितमेकं द्रव्यम् (चवि. ८.१३९) पेटारी वृक्ष.

**कुलिङ्गक**–पु., प्रतुदपक्षि० कुलिङ्गः कालचटकः (अहृसू. ६.४९; चसू. २७.३६; चसू. २७.५१)

भक्ष्य टोचण्या मारून खाणारा. एक पक्षी. सुगरण.

**कुलित्थ**–पु., शिम्बीधान्य० कुलत्थः (ध. ६.१०५)

शेंगाधान्यापैकी एक. कुळीथ, हुलगा.

कुलित्थिकामूल, न., वनकुलत्थमूलम् कुलत्थिका-मूलम् (असंउ.३७)

रान कुळथाचे मूळ.

**कुलिन्**–पु., वनस्पति० कोविदारः ( ध. १.१९६ )
कांचन.

**कुलिश**–न., मणि० हीरकः ( ध. ६.५५ )
एक रत्न, हिरा.
पु,. जलचर० समुद्रजो मत्स्यः
( सुसू. ४६.११८ )
एक जलचर प्राणी. समुद्रातला मासा.

**कुली**–स्त्री., वनस्पति० बृहती ( ध. १.९३ ) डोरली.

**कुलीन**–वि., सुकुले जातः ( सुक. १.८ )
चांगल्या कुळात जन्मलेला.
न., क्षुद्ररोग० कुनखरोगः ( सुनि. १३.२३ )
एक क्षुद्र रोग, वाईट नख, विकृत नख.

**कुलीर**–पु., वनस्पति० कर्कटशृङ्गी ( असंउ. २० )
काकडशिंगी,
जलचरप्राणि० कर्कटः ( सुउ. ५२.४७ )
( असंसू. ७.१०३; सुचि. २५.१८ )
एक पाण्यात रहाणारा प्राणी. खेकडा.
गृहचटकः, ( सुचि. २६–२६ )
कुलीरो मत्स्यः, ( सुचि. २६–२६ )
घरातील चिमणा. एक मासा.
रसमण्डपे पूजनीया देवता० ( र. ६.२५ )
पाऱ्यावर संस्कार करताना दिलेल्या मंडपात ज्या देवतेची स्थापना करून पूजा करितात ती.

**( कुलीरा )**–स्त्री., वनस्पति० कर्कटशृङ्गी ( ध. १.८५ )
काकडशिंगी.

**–कपाल**–न., कच्छपवराटकः ( असंउ. ६ )
कासवाची कवटी. पाठ.

**–भृङ्गी**–स्त्री.. वनस्पति० कर्कटशृङ्गी ( ध. १.८५ )
काकडशिंगी.

**–रस**–पु., कर्कटप्राणिनो मांसरसः
( असंसू. ८.९४ ) खेकड्याचा रस.

**–शृङ्गी**–स्त्री., वनस्पति० कर्कटशृङ्गी
( चसू. ४.१४. ( ३० ) असंउ. ५० )
एक वनस्पती. काकडशिंगी.

**कुलेचर**–पु., न., वनस्पति० छत्रकभेदः, खुखुण्डकः, उद्भिदशाकम्, गुणाः–कफकरं, सुष्टमूत्रपुरीषं च
( सुसू. ४६.२९० )
अळमे, अळंबे.

**कुलेवर**–पु., न., शाक० कुलेचरः ( सुसू. ४६.२९० )
एक भाजी. पहा 'कुलेचर'.

**कुल्माष**–पु., न., यवपिष्टम्, उष्णोदकसिक्तम्, ईषत्स्विन्नम्, अपूपीकृतम्,
कुल्माषमाहुः ( चसू. २७.२६० )
जवाचे पीठ. उन पाणी शिंपडलेले थोडे शिजवलेले पोळी किंवा भाकरी केलेले.
यवमुद्गकुलत्थचणकादयोऽर्धस्विन्ना इति
( चशा. ६.११ सुसू. २०.१३ )
( अहृसू. ११.३२ ) पारियात्रास्तु मुद्गान् मसूरान् उत्स्विन्नमृदितान्, कुल्माषानाहुः
( चचि. २०.२८ ) गुणाः—वातलो, रूक्षो, गुरुर्भिन्नवर्चाश्च ( सुसू. ४६.४९ ) संग्राही,
( असंसू. ७.२२४ ) वारुणीकुल्माषाभ्यां बलाकां नाश्नीयात्संयोगविरुद्धत्वात् ( सुसू. २०.१३ )
जव, मूग, कुळीथ, हरभरे इत्यादी अर्धे शिजवलेले खाद्य–घुगऱ्या, उसळ. विंध्याद्रीच्या पश्चिमेस अरवलीच्या जवळच्या भागातील लोक मूग, मसूर शिजवून घाटतात त्याला म्हणतात. गुण–वातूळ, रूक्ष, जड व मळ फोडणारा आहे. बगळ्याचे मांस, कुल्माष व वारुणी जातीची दारु एकत्र खाऊ नये. अनिष्ट परिणाम होतात.

**कुल्माषाभिभव**–न., आसुत० काञ्जिकम्
( ध. ६.२४९ ) कांजी, आंबवलेली.

**कुल्या**–स्त्री., अल्पा कृत्रिमा सरित् ( सुशा. ७.३ )
कृत्रिम प्रवाह, पाट, कालवा.

**कुलुका**–स्त्री., चुलुका ( र. ८.५१ ) एक मासा.

**कुवल**–न., वनस्पति० नीलपद्मम् ( ध., ४.१५० )
कुमुदभेदः, जलजपुष्पम्, शाकत्वेनोपयुज्यते
( सुसू. ४६.२८५ )
निळे कमळ, पाण्यातील फूल, कमळाचा प्रकार. भाजी म्हणून उपयोग.
बदरभेदो, महाकषायवर्गे हृद्यगणे एकं द्रव्यम्
( चसू. ४.१० ( १० ) आसवार्थमुपयुक्तम्
( चसू. २५. ४९ ) विरेचनोपगगणे एकं द्रव्यम्
( चसू. ४.१३. ( २४ ) बृहद्बदरीफलम्
असंसू. १५.१५. ) द्र० 'बदर.'
बोरांचा प्रकार. हृदयास हितकर गणातील एक द्रव्य. आसवांकरिता उपयोगी. रेचक औषधांच्या कार्याला मदत करणाऱ्या द्रव्यांतील एक. मोठे बोर.

**कुवलय**–न., वनस्पति० नीलपद्मम् ( ध., ४.१५० )
निळे कमळ.
रक्तोत्पलम् ( सुसू. १३.१४ ) तांबडे कमळ.
ईषन्नील धवलमुत्पलम्, उत्पलादिगणे एकं द्रव्यम् ( सुसू. ३८.५२ )

थोडी निळी छटा असलेले पांढरे कमळ. उत्पलादी गणातील एक.

**कुवलयिनी**–स्त्री., **वनस्पति० कुमुदम्** ( रा. १०.२५० ) कमळ.

**कुश**–पु., **वनस्पति० दर्भः** ( ध. ४.१३३ ) **तृणपञ्चमूलेष्वेकः** ( चसू. २.२६ ) **ह्रस्वदर्भो मृदुः सूचीपत्रो वीरतर्वादिगणे एकः** ( सुसू. ३८.१२ ) **मूत्रविरेचनीयगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१५ ( ३५ ) **कुशमूलं निर्वापणप्रदेहे** ( चसू. ३.२७ ) **अधोभागहरद्रव्येष्वेकम्** ( सुसू. ३९.४ )

**स्तन्यजननगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१२ ( १७ ) **द्र० 'दर्भ.'**

दर्भ. तृणपंचमुळातील एक द्रव्य. वरील ४ गणातील एक द्रव्य. लहान दर्भ. मऊ बारीक पानाचा. दोषशामक लेपाकरिता.

**( कुशा )**–स्त्री., **वेणुदलम्, वंशादिकम्बिका** ( अहसू. २९.५९ ) वेळूचे पान. वेळूची फांदी. **भग्नबन्धनम्, भग्नव्रणबन्धनद्रव्यं वा** ( सुचि. ३.६ ) **कुशानिर्माणार्थं मधुकोदुम्बराऽश्वत्थ–पलाश–ककुभ-वंश–सर्ज–वृक्षाणां च त्वच उपसंहरेत्** ( सुचि. ३.६ )

भंगलेले हाड बांधणे किंवा त्या व्रणाला बांधावयाचा पट्टा इत्यादी. मोह, उंबर, पिंपळ, पळस, अर्जुन-सादडा, बांबू, राळ, या वृक्षांच्या साली व्रण बांधण्यास उपयुक्त.

**–द्वय**–न., **स्थूलसूक्ष्मभेदेन दर्भद्वयम्** ( अहसू. १५.२४ ) **द्र० 'दर्भ.'**
मोठा व लहान असे दोन दर्भ.

**–पत्र**–न., **शस्त्र०, कुशपत्रतुल्यम्। तन्मानं द्व्यङ्गुलं रुचकं त्र्यङ्गुलं फलम्। वृन्तं त्र्यङ्गुलं ( द्व्यङ्गुलं ) मध्ये "तीक्ष्णाग्रं कुशपत्रार्धमङ्गुलं दैर्घ्यतः फलम्। वृन्तं स्यात् त्र्यङ्गुलं यस्य कुशपत्रं तदुच्यते"। ( इति हाराणचंद्रः ) कुशपत्रे तन्त्रान्तरं, "वृन्तं स्यात् त्र्यङ्गुलं मध्ये कुशपत्रस्य लक्षणमिति"** ( चक्रः, ) **विस्रावणोपयोगि शस्त्रम्** ( सुसू. ८.४ ) एक शस्त्र. दर्भाच्या पानासारखे. माप–दोन अंगुले टोक, तीन अंगुले पाते व दांडा तीन किंवा दोन अगुळांचा. या पेक्षाही लहान पात्यांचा तीक्ष्ण टोकाचा एक प्रकार असतो. गळवातून स्राव होण्याच्या दृष्टीने याचा उपयोग होतो.



**–पुट**–न., **वनस्पति० कुशपत्रम्** ( चक्र. १.१३ ) एक वनस्पती.

**–मुस्तक**–न., **कन्दविष०** ( असंउ. ४० ) विषारी कंद.

**–मूढ**–पु., **कुशविरचितः पुटकः** ( सुसू. ४३.३ ) दर्भांचा विणलेला पुडा.

**–शय्या**–स्त्री., **दर्भशय्या** ( सुचि. २९.१२ ) दर्भाची शय्या.

**–हस्तक**–न., **संमार्जनी** ( चसू. १५.७ ) केरसुणी, झाडणी, झाडू.

**कुशाग्र**–न., **दर्भाग्रम्** ( असंउ. १ ) दर्भांचे टोक.

**कुशादिपञ्चमूल**–न., **द्रव्यगण०, कुश–काश–नल–दर्भकाण्डे–क्षव इति पञ्चमूलानि** ( सुचि. ३८.५१ ) कुश, लव्हाळे, नळ, दर्भ, ऊस यांची मुळे.

**कुशाम्र**–पु., **वनस्पति० क्षुद्राम्रः** ( असंउ. २२ ) हलक्या जातीचा आंबा. लहान आंबा.

**कुशालिन्**–पु., **वनस्पति० अश्मन्तकः** ( ध. १.१९४ ) आपटा.

**कुशाटा**–स्त्री., **शस्त्र० इदं शस्त्रं वदने स्रावे योज्यम्** ( अहसू. २६.१० अरुणदत्त ) **कुशपत्रम्, आटामुखं चेति शस्त्रद्वयमाह कुशाटा इति ( हेमाद्रिः )**
एक शस्त्र. तोंडातून स्राव व्हावा म्हणून हे उपयुक्त. कुशपत्र व आटामुख ही दोन शस्त्रे. कुशाटा हे हेमाद्रींने दिलेले नांव.

**कुशाम्रशिम्बी**–स्त्री., **फल० गुणाः–मधुरा, वातपित्तहरा, हिमा च** ( असंसू. ७.३३ ) एक शेंग. **गुण**–गोड, थंड, वातपित्तहर.

**कुशिक**–पु., **ऋषि० हिरण्याक्षापरनामा** ( चसू. २५.१६ ) **रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः** ( चसू. १.११ ) एक ऋषि. हिरण्याक्ष हे दुसरे नाव. हिमालयाच्या उतरणीवर रोगनाशाच्या विचारविनिमयाकरिता जमलेल्या महर्षींपैकी एक.

**–तरु**–पु., **वनस्पति० जरणद्रुमः** ( रापरि. ९.१३ ) लांब पानाचा अश्वकर्ण.

**कुशेशय**–न., **कुमुदम्** ( ध. ४.१५४ ) कमळ. **रक्तपद्मम्** ( रा. १०.२४३ र. ४.१० ) तांबडे कमळ.

**कुशोदक**–न., **कुशैः षडङ्गविधिना कृतमुदकं कुशोदकं ज्ञेयम्। प्रमेहे पेयत्वेनोपयुक्तम्** ( चचि. ६.४६ )

षडंगोदकाच्या कृतीने केलेले दर्भाचे पाणी. प्रमेहामध्ये पिण्याकरिता.

**कुष्कुण्ड**–न., वनस्पति० पललादिच्छत्रिका (चशा. ६.११) पावसाळ्यात उगवणारी छत्री; अळंबे.

**कुष्ठ**–न., वनस्पति० कुलिञ्जनम्, सुगन्धिद्रव्यम् । कोष्ठः एलादिगणे एकं द्रव्यम् ( सुसू. ३८.२४ ) सिराव्यधनान्तरमप्रवृत्ते रक्ते तत् प्रवर्तनार्थमुपयुज्यमानं द्रव्यम् ( सुसू. १४.३५ ) वातहराभ्यङ्गोपनाहोपयोगिनां श्रेष्ठम् ( चसू. २५.४० ) कुमाराणां वपुर्मेधाबलबुद्धिविवर्धकसुवर्णप्राशद्रव्येष्वेकम्
( सुशा. १०.६८ )

शीतघ्नप्रदेहे उपयुक्तम् ( चसू. ३.२८ )
आस्थापनोपगगणे एकं द्रव्यम् (चसू. ४.१३ (२५) त्वग्रोगेष्ववचूर्णनार्थम् ( चसू. ३.१० ) वातसंशमनवर्गे द्रव्यमेकम् ( सुसू. ३९.७ ) महाकषायवर्गे लेखनीयगणे एकम् ( चसू. ४.९ ( ३ ) शुक्रशोधनगणे द्रव्यमेकम् ( चसू. ४.१२ ( २० ) शिरोरुजायां प्रदेहार्थम् ( चसू. ३.२३ ) गुणाः– तिक्तं कटूष्णं कफमारुतरक्त( पित्त )जित् त्रिदोषविषकण्डूंश्च कुष्ठरोगांश्च नाशयेत् ( ध. ३.५० )
विसर्पविषकण्डूतिखर्जूदद्रुघ्नं कान्तिकृच्च
( रा. १२.९८ )

हिं.—कूठ.
म.—**कोष्ठ.**
गु.—कुठ, उपलेट.
बं.—कुड.
त.—गोष्टम्.
फा.—कोश्नह.

कोष्ठ कोलिंजन, उपलेट, सुगंधि द्रव्य. एलादिगण. आस्थापन बस्तीचा उपयुक्त गण. वातसंशमनवर्ग, महाकषायवर्ग, लेखनीयगण; शुक्रशोधनगण यांतील एक द्रव्य. शिरेचा वेध केल्यावर रक्तस्राव होत नसेल तर व वातहर पोटीस करण्याकरिता श्रेष्ठ. मुलांना शरीर, बुद्धिबल, धारणाशक्ति वाढविण्याकरता सुवर्णाबरोबर देण्यासाठी, थंडी नाहीशी व्हावी म्हणून, डोके दुखत असताना लावण्याकरिता, त्वचेच्या रोगांवर भुरभुरण्याकरिता उपयुक्त द्रव्य आहे. **गुण**–कडु, तिखट, उष्ण, कफ, वात व रक्त यातील दोष जिंकणारे, त्रिदोषहर, कण्डू व कुष्ठहर आहे.

रोग० बहिर्मार्गजरोगेष्वेकः ( चसू. ११.४९ ) रक्तदोषजरोगः ( चसू. २८.११ ) दीर्घरोगाणां श्रेष्ठम् ( चसू. २५.४० ) ( असंसू. १३.३ ) पापरोगः ( सुनि. ५.३० ) व्युत्पत्तिः–त्वगादीन् कुष्णातीति कुष्ठम् ( चनि. ५.६ ) कालेन उपेक्षितं यस्मात् सर्वं कुष्णाति तद्वपुः ( असंनि. १४.६ ) अधिष्ठानम्–चतुर्थी ताम्रा नाम त्वक्, पञ्चमी वेदिनी नाम त्वक् ( चशा.७.४ ) ( सुशा. ४.४ ) रोगहेतवः–ब्रह्मस्त्रीसज्जनवधपरस्वहरणादिभिः कर्मभिः कुष्ठस्य संभवः ( सुनि. ५.३० ) गात्रसंस्पर्श–निःश्वास-सहभोजन–शय्याऽऽसनवस्त्र–माल्यानुलेपनादीनि ( सुनि. ५.३४ ) शीतोष्णव्यत्यासमननुपूर्व्योपसेवमानस्य तथा संतर्पणाभ्यव्यवहार्यव्यत्यासं, मधुफाणितमत्स्य–लकुच–मूलककाकमाचीसततमतिमात्रमजीर्णे च समश्नतः, चिलिचिमं च पयसा, हायनकयवकचीनकोद्दालककोरदूषप्रायाणि चान्नानि क्षीरदधितक्रकोलकुलत्थमाषातसीकुसुम्भस्नेहवन्ति, एतैरेवाऽतिमात्रं सुहितस्य च व्यवायव्यायामसंतापानत्युपसेवमानस्य, भयश्रमसंतापोपहतस्य च सहसा शीतोदकमवतरतो, विदग्धं चाऽऽहारजातमनुल्लिख्य विदाहीन्यभ्यवहरतश्छर्दिं च प्रतिघ्नतः, स्नेहांश्चाऽतिचरतस्त्रयो दोषा युगपत्प्रकोपमापद्यन्ते, त्वगादयश्चत्वारः शैथिल्यमापद्यन्ते, तेषु शिथिलेषु दोषाः प्रकुपिताः स्थानमधिगम्य संतिष्ठमानास्तानेव त्वगादीन् दूषयन्तः कुष्ठान्यभिनिर्वर्तयन्ति ( चनि. ५.६ ) विप्रान् गुरून् धर्षयतां पापं कर्म च कुर्वतां कुष्ठं समुपलभ्यते ( चचि., ७.८ ) तस्मिन् दक्षाध्वरध्वंसे देहिनां हविष्प्राशात् कुष्ठोत्पत्तिरभूत् ( चनि. ८.११ ) स्त्रीपुंसयोः कुष्ठदोषात् कुष्ठशोणितशुक्रयोः । यदपत्यं तयोर्जातं ज्ञेयं तदपि कुष्ठितम् ॥ ( सुनि. ५.२७ )

नागाभ्रं भक्षिते सति मण्डलकुष्ठं भवति ( र. २. ६ ) संप्राप्तिः—पित्तश्लेष्माणौ प्रकुपितौ परिगृह्य अनिलः प्रवृद्धस्तिर्यग्गाः सिराः संप्रतिपद्य समुद्धूय बाह्यं मार्गं प्रति समन्ताद्विक्षिपति, यत्र यत्र च दोषो विक्षिप्तो निःस( श्च )रति तत्र तत्र मण्डलानि प्रादुर्भवन्ति, एवं समुत्पन्नस्त्वचि दोषस्तत्र तत्र च परिवृद्धिं प्राप्य अप्रतिक्रियमाणोऽभ्यन्तरं प्रतिपद्य धातूनभिदूषयति ( सुनि ५.३ चनि. ५.६ ) दोषाः सिराः प्रपद्य तिर्यग्गास्त्वग्लसीकासृगामिषं श्लथीकृत्य दूषयन्ति ततो बहिः संचरन्तस्त्वचो वैवर्ण्यं कुर्वन्ति

तत्कुष्ठमुशन्ति । कुष्ठसंप्राप्तौ त्रयो दोषा रसरक्तत्वङ्मांसादयश्चत्वारो दूष्या इति सप्तको द्रव्यसंग्रहः ( असंनि. १४.४; चचि. ७.९ ) संख्यासंप्राप्तिः—तत्र द्विविधानि कुष्ठानि—महाकुष्ठानि क्षुद्रकुष्ठानि च, तत्र सप्त महाकुष्ठान्येकादश क्षुद्रकुष्ठानि एवमष्टादश कुष्ठानि भवन्ति, तत्र महाकुष्ठानि—अरुणौदुम्बर—ऋष्यजिह्व—कपाल—काकणकपुण्डरीकदद्रुकुष्ठानीति क्षुद्रकुष्ठान्यपि स्थूलारुष्कं महाकुष्ठमेककुष्ठं चर्मदलं विसर्पः परिसर्पः सिध्मं विचर्चिका किटिभं ( मं ) पामा रकसा चेति, सर्वाणि कुष्ठानि सवातानि सपित्तानि सश्लेष्मकाणि सक्रिमीणि च भवन्ति ( सुनि. ५.५ ) चरकसुश्रुतयोः कुष्ठनामभेदः—चरके महाकुष्ठं मण्डलं क्षुद्रकुष्ठानि अलसं विपादिका शतारुषी विस्फोटश्चर्मदलं चेति, सुश्रुते महाकुष्ठमरुणं, क्षुद्रकुष्ठानि स्थूलारुष्कं महाकुष्ठं परिसर्पो विसर्पो रकसा चेति ( अहृनि. १४.३० ) पूर्वरूपाणि—अस्वेदनमतिस्वेदनमतिश्लक्ष्णता पारुष्यं वैवर्ण्यं कण्डूर्निस्तोदः सुप्तता परिदाहः परिहर्षो लोमहर्षः खरत्वं गौरवमुष्णायनं श्वयथुर्वीसर्पागमनमभीक्ष्णं च काये कायच्छिद्रेषूपदेहः पक्वदग्धदष्टभग्नक्षतोपस्खलितेष्वतिमात्रं वेदना स्वल्पव्रणानामपि दुष्टिरसंरोहणं च ( चनि. ५.७; चचि. ७.१२ ); दोषभेदेन कुष्ठप्रकाराः—वातेन कापालं पित्तादौदुम्बरं कफान्मण्डलाख्यं विचर्ची च वातपित्तादृक्षाख्यं वातश्लेष्मणश्चर्मैककुष्ठकिटिभसिध्मालसविपादिकाः श्लेष्मपित्ताद्दद्रुशतारुषीपुण्डरीकविस्फोटपामचर्मदलानि सर्वदोषेभ्यः काकणम् ( असंनि. १४ ) वातजकुष्ठलक्षणानि—रौक्ष्यं शोषस्तोदः शूलः संकोचनमायामः पारुष्यं खरभावो हर्षो श्यावारुणत्वं च ( चचि. ७.३४ ) पित्तजकुष्ठलक्षणानि—दाहो रागः परिस्रवः पाको विस्रो गन्धः क्लेदोऽङ्गपतनं च ( चचि. ७.३५ ) कफजकुष्ठलक्षणानि—श्वैत्यं शैत्यं कण्डूः स्थैर्यमुत्सेधगौरवस्नेहा जन्तुभिरभिभक्षणं क्लेदश्च ( चचि. ७.३६ ); सप्तमहाकुष्ठानां क्रमेण लक्षणानि—यत्कृष्णारुणकपालाभं रूक्षं परुषं तनु तोदबहुलं विषमं तत् कापालं कुष्ठम्। यद्दाहकण्डूरुजारागपरीतं लोमपिञ्जरमुदुम्बरफलाभासं कुष्ठमौदुम्बरं, यच्छ्वेतं रक्तं स्थिरं स्त्यानं स्निग्धमुत्सन्नमण्डलं कृच्छ्रमन्योन्यसंसक्तं कुष्ठं मण्डलं, यत्कर्कशं रक्तपर्यन्तमन्तःश्यावं सवेदनं ऋष्यजिह्वसंस्थानं तदृष्यजिह्वमुच्यते। यत् श्वेतं रक्तपर्यन्तं पुण्डरीकदलोपमं सोत्सेधं सदाहं च तत्पुण्डरीकम्। यच्छ्वेतं ताम्रं तनु तथा घृष्टे सति रजो विमुञ्चत्यलाबूपुष्पवर्णं तत्सिध्मं प्रायेण चोरसि भवति । यत्काकणन्तिकावर्णमपाकं तीव्रवेदनं त्रिदोषलिङ्गयुक्तं तत्कुष्ठं काकणं नैव सिध्यति ( चचि. ७.१४–२० ) वातेनारुणाभानि तनूनि विसर्पीणि तोदभेदस्वापयुक्तान्यरुणानि, पित्तेन पक्वोदुम्बरफलाकृतिवर्णान्यौदुम्बराणि, ऋष्यजिह्वाप्रकाशानि खराणि ऋष्यजिह्वानि; कृष्णकपालिकाप्रकाशानि कपालकुष्ठानि; काकणन्तिकाफलसदृशान्यतीव रक्तकृष्णानि काकणकानि; तेषां चतुर्णामप्योषचोषपरिदाहधूमायनानि क्षिप्रोत्थानप्रपाकभेदित्वानि क्रिमिजन्म च सामान्यानि लिङ्गानि । पुण्डरीकपत्रप्रकाशानि पौण्डरीकाणि श्लेष्मणाऽतसीपुष्पवर्णानि ताम्राणि वा विसर्पीणि पिडकावन्ति च दद्रुकुष्ठानि तयोर्द्वयोरप्युत्सन्नता परिमण्डलता कण्डूश्चिरोत्थानत्वं चेति सामान्यानि रूपाणि ( सुनि. ५.७ ) महाकुष्ठेष्वेतेषु सामान्येन त्वक्संकोचस्त्वग्भेदस्त्वग्विदारणं त्वक्स्वपनं अङ्गसादश्चैतानि लक्षणानि भवन्ति ( सुनि. ५.८ ) क्षुद्रकुष्ठानि—यदस्वेदनं महावास्तु मत्स्यशकलोपमं तदेककुष्ठम्। चर्माख्यं बहलं हस्तिचर्मवद्यच्छ्यावं किणखरस्पर्शं परुषं तत्किटिभम् । यत्पाणिपादस्फुटनं तीव्रवेदनं तद्वैपादिकम् । यत्कण्डूमद्भिः सरागैश्च गण्डैर्युक्तं तदलसकम् । यत्सकण्डूरागपिडकमुद्गतं मण्डलं तद्दद्रु । यद्रक्तं सकण्डु सस्फोटं सरुग्दलति तच्चर्मदलम् । संस्पर्शासहं च तत् । श्वेतारुणश्यावाः कण्डूलाः पिडका यत्र सा पामा । ये स्फोटाः श्वेतारुणभासः स्युस्तनुत्वचश्च ते विस्फोटाः । यद्रक्तं श्यावं सदाहार्ति बहुव्रणं तच्छतारुः । सकण्डूकाः श्यावाः बहुस्रावाः पिडकाः सा विचर्चिका । ( चचि. ७.२१–२६ ) येन शरीरं कृष्णारुणं भवेत्तदेककुष्ठम् । येन कण्डूः व्यधनौषचोषास्तलेषु भवन्ति तच्चर्मदलम्। यत्सर्वतो विसर्पवत्सर्पति त्वग्रक्तमांसान्यभिभूय मूर्च्छाविदाहारतितोदपाकान् करोति स विसर्पः । याः पिडकाः स्रवन्त्यः शरीरे शनैः सर्पन्ति स परिसर्पः । यत्प्रायश ऊर्ध्वकाये कण्डूमत् श्वेतमपायि च तत्सिध्म विद्यात्तनु च । या राज्योऽतिकण्डूतिरुजो रूक्षा गात्रेषु भवन्ति

सा विचर्चिका । या कण्डूमती दाहरुजोपपन्ना पादगता च सा विपादिका । यत्स्रावि वृत्तं घनमुग्रकण्डु स्निग्धकृष्णं च तत्किटिभम् । सास्रावकण्डूपरिदाहकाभिः अणुकाभिः पिडकाभिर्युक्ता सा पामा । स्फिक्पाणिपादप्रभवैः स्फोटैः सदाहैरतियुक्ता सा कच्छूर्निरूप्या । शरीरे या कण्ड्वन्विता पिडका संस्रावहीना च सा रकसा ( सुनि., ५.९–१४ ) **सप्तधातुगतस्य कुष्ठस्य क्रमेण लक्षणानि**– कुष्ठे त्वचि समाश्रिते सति स्पर्शहानिः स्वेदनत्वमीषत्कण्डूश्च वैवर्ण्यं रूक्षभावश्च भवति । कुष्ठे शोणितसंश्रिते सति त्वक्स्वापो रोमहर्षः स्वेदस्याभिप्रवर्तनं कण्डूर्विपूयकश्चैव भवति । बाहुल्यं वक्त्रशोषः कार्कश्यं पिडकोद्गमश्च भवति । कुष्ठे मांससमाश्रिते सति तोदः स्फोटः स्थिरत्वं च । कुष्ठे मेदःसमाश्रिते सति दौर्गन्ध्यमुपदेहश्च पूयः क्रिमयः गात्रभेदनं च भवति । कुष्ठे ह्यस्थिमज्जसमाश्रिते सति नासाभङ्गोऽक्षिरागश्च क्षते क्रिमिसंभवः स्वरोपघातश्च भवति ( सुनि., ५.२१–२५ )

**उपद्रवाः**–दोषभेदेन कुष्ठोपद्रवाः–वातजाः श्यावारुणवर्णत्वं, परुषता, रौक्ष्य–शूल–शोष–तोद–वेपथु–हर्ष–संकोचाऽऽयास–स्तम्भ–सुप्ति–भेद–भङ्गाः । पित्तजाः–दाह–स्वेद–क्लेद–कोथ–स्राव–पाक–रागाः । श्लेष्मजाः–श्वैत्य–शैत्य–कण्डू–स्थैर्य–गौरवोत्सेधोपस्नेहोपलेपाः । **सर्वसाधारणाः**– अङ्गभेदः, प्रस्रवणमङ्गावयवानां पतनानि, तृष्णा–ज्वराऽतीसार–दाह–दौर्बल्याऽरोचकाऽविपाकाः । क्रिमयस्तु–त्वगादींश्चतुरः सिराः–स्नायु–तरुणास्थीन्यप्याददते ( चनि. ५.१०–११ ) **कुष्ठे रिष्टलक्षणानि**–कायेऽल्पमपि संस्पृष्टं सुभृशं यस्य दीर्यते । क्षतानि च न रोहन्ति कुष्ठैर्मृत्युर्हिनस्ति तम् ॥ ( चइ. ५.१४ ); कुष्ठं विशीर्यमाणाङ्गं रक्तनेत्रं हतस्वरम् । मन्दाग्निं जन्तुभिर्जुष्टं हन्ति तृष्णाऽतिसारिणम् ॥ ( असंशा. ११ ); नग्नस्याज्यावसिक्तस्य जुह्वतोऽग्निमनर्चिषम् । पद्मान्युरसि जायन्ते स्वप्ने कुष्ठैर्मरिष्यतः ॥ ( चइ. ५.१५ ) **कुष्ठे साध्यासाध्यता**–प्रभिन्नं प्रस्रुताङ्गं च रक्तनेत्रं हतस्वरम् । पञ्चकर्मगुणातीतं कुष्ठं हन्तीह कुष्ठिनम् ( सुसू. ३३.९ ) महाकुष्ठानां महत्वं क्रियागुरुत्वमुत्तरोत्तरं धात्वनुप्रवेशादसाध्यत्वं चेति ( सुनि. ५.७ ) कपालकुष्ठोदुम्बरकुष्ठमण्डलकुष्ठर्ष्यजिह्वकुष्ठपुण्डरीककुष्ठसिध्मकुष्ठानि साध्यानि । काकणकुष्ठमसाध्यम् ( चनि. ५.८ ) जन्मान्तरेऽपि कुष्ठस्यानुबन्धो भवति ( सुनि ५.३१ ) **कुष्ठचिकित्सा**–आहाराचारयोः प्रोक्तामास्थाय महतीं क्रियाम् । औषधीनां विशिष्टानां तपसश्च निषेवणात् ॥ यस्तेन मुच्यते जन्तुः स पुण्यां गतिमाप्नुयात् ( सुनि. ५.३२ ) हरिद्रागोमूत्रयोगो मञ्जिष्ठादियोगो लाक्षादियोगोऽरिष्टसप्तपर्णयोगः, पिप्पलीमूत्रयोगश्चित्रकगोमूत्रयोगस्त्रिफलाघृतयोगो, निम्बक्वाथः, खदिरयोगः, स्नानार्थं रोध्रादियोगस्त्रिवृत्योगश्चाऽर्कादियोगो, लाक्षादितैलं, कारभमूत्रयोग आरग्वधादिसिद्धघृतयोगो, गोमूत्रयवतिक्तसिद्धघृतयोगो, रसाञ्जनगोमूत्रयोगो, लेपार्थं विविधा योगाः ( सुचि. ९ ) सरलपीतदारुशिंशपागुरुसारस्नेहा दद्रुकुष्ठकिटिभेषूपयुज्यन्ते ( सुचि. ३१.५ ) **कुष्ठे शोधनमावश्यकम्**–मासान्मासात्कुष्ठिनं विरेचयेत् । त्रिरात्रात् त्रिरात्रात् नस्यं दद्यात् । पक्षात्पक्षाच्छर्दनान्यभ्युपेयात् । रक्तमोक्षणं च वर्षस्य द्विः कृत्वाऽल्पाल्पमेव स्रावयेत् ( सुचि. ९ ) **पथ्यापथ्यम्**–असेव्याः पदार्थाः–मांसं, वसा, दुग्धं, दधि, तैलं, कुलत्था, माषा, निष्पावा, इक्षु, पिष्टविकाराः, अम्लं, विरुद्धाहारोऽध्यशनमजीर्णं, विदाह्यभिष्यन्दि, दिवास्वप्नव्यवायः सुरासेवनं च । **विहितानि पथ्यानि**–त्वग्दोषी शालिषष्टिकयवगोधूमकोद्रवश्यामाकोद्दालकादीन् पुराणान् भुञ्जीत । मांससात्म्याय रुग्णाय मेदोरहितं जाङ्गलं मांसं देयम् । अभ्यङ्गार्थे वज्रकतैलमुपयोज्यम् । उत्सादनार्थे आरग्वधादिकषाय उपयोक्तव्यः । **पानम्**— परिषेकाऽवगाहेषु खदिरकषाय उपयोज्यः । अपि च नीचरोमनखत्वं, श्रान्तत्वमौषधतत्परत्वम् आस्थेयम् ( सुचि. ९ ) **संदर्भाः**—( चसू. १.११–२५.२८ चशा. ७ ) ( चनि. ५.८ चचि. ७ ) ( चइ. ५ ) ( सुनि. ५ ) ( सुशा. ४ ) ( सुसू. ३३ ) ( सुचि. ९ ) ( सुसू. २४ ) ( सुचि. ३१ ) ( असंसू. १३.१६–३६ ) ( असंनि. १४ ) ( असंशा. ११.१२ ) ( अहनि. १४ का. ) कुष्ठचिकित्सा ( र. २.६ २.५३ १२.८ २२.१५८ )

**श्वित्रमथवा किलासकुष्ठम्**–कुष्ठैकसंभवं श्वित्रं किलासं वारुणं भवेत् । निर्दिष्टमपरिस्रावि त्रिधातूद्भवसंश्रयम् ॥ वाताद्रूक्षारुणं पित्तात्ताम्रं कमलपत्रवत् । सदाहं रोमविध्वंसि कफात् श्वेतं घनं गुरु ॥ सकण्डूरं क्रमाद्रक्त–मांसमेदस्सु चादिशेत् ।

**वर्णैनैवेदृगुभयं कृच्छ्रं तच्चोत्तरोत्तरम् ॥ तथा च भोजः–" श्वित्रं तद् द्विविधं विद्यात् दोषजं व्रणजं तथा । तथा मिथ्योपचाराद्धि व्रणस्य व्रणजं स्मृतम् ॥ दोषजं द्विविधं प्रोक्तमात्मजं परजं तथा । परसंस्कार-संस्पर्शात् यत्तत्परजमुच्यते ॥ तदात्मजं विजानीयात् यद्देहेष्वनिलादिजम् "** ( मा )

एक बहिर्मार्गज रक्तज महारोग. दीर्घरोगामध्यें श्रेष्ठ. पापरोग. **व्युत्पत्ति**–त्वचा इत्यादींना कुजवणारा म्हणून कुष्ठ. या रोगाची उपेक्षा केली असता प्रत्येक कुष्ठ शरीर कुजवते. **अधिष्ठान**–चवथी ताम्रा आणि पाचवी वेदिनी त्वचा. **पौराणिक कथा**–दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस झाल्यावर तो हविर्भाग खाणाऱ्यांना कुष्ठ झाले. **कारणे**–( १ ) पापकर्मे, ब्राह्मण, स्त्री, सज्जन यांचा वध, दुसऱ्याचे द्रव्य हरण करणे, ब्राह्मण, गुरु यांचा द्वेष करणे. (२) **आहार**–पौष्टिक उपचार एकदम सोडून शरीर कृश करणारे ( लंघन इ. ) उपचार तसेच लंघनादि उपचार एकदम बंद करून पौष्टिक सुरू करणे, मद्य, काकवी, मासे, लकुच ( ओटीचे फळ ) मुळा, कावळी, नेहमी अतिप्रमाणाने खाणे, अजीर्ण झाल्यावर खाण्याची खोड असणे, घशाशी जळजळ, आंबट, करपट, ढेकर आणणारे पदार्थ खाल्ल्यानंतर तो त्रास होत असता उलटी करून ते काढून न टाकता पुन्हा तसेच पदार्थ खाणे, स्नेह–तूप तेल इत्यादी पदार्थ अतिप्रमाणात सेवन करणे ( ३ ) **विहार**–वर सांगितलेला विरुद्ध आहार अतिप्रमाणात घेऊन व्यायाम, संभोग व संताप करण्याने, श्रम करून थकल्यावर संतापाने किंवा भीतीने त्रस्त असता एकदम थंड पाण्यात डुंबण्याने, अति थंड पदार्थ सेवन केल्यानंतर लगेच अत्युष्ण सेवन करण्याने, किंवा अति उष्ण सेवन केल्यानंतर लगेच अगदी थंडगार द्रव्ये एकदम सेवन केल्याने, ओकारी होत असता ती होऊ न दिल्याने ( दाबल्याने ) कुष्ठ होते. ( ४ ) **कुष्ठरोग्याचा स्पर्श**–त्या रोग्याचा निःश्वास श्वासाबरोबर फुप्फुसात जाणे, त्याच्याशी एकत्र भोजन, एकशय्या व आसन त्या रोग्याची फुले उटणी इत्यादी वापरणे या कारणांनी एका कुष्ठ रोग्याचे कुष्ठ दुसऱ्यास होते. ( ५ ) **आनुवंशिक**–स्त्रीपुरुष कुष्ठी रोग्यांचे शुक्र व रज कुष्ठ दोषांनी दुष्ट झाले असल्यास त्या दोहोंपासून झालेली संतति ही कुष्ठी होईल. **संप्राप्ति**–कारणांनी तिन्ही दोष प्रकुपित होऊन त्यांना वात तिर्यग्गत–त्वचे-कडील शिरांकडे आणतो व वाताने फेकले गेलेले दोष त्वचेवर विखुरतात; जेथे जेथे हे दोष राहतात तेथे तेथे मंडले उत्पन्न होतात. दोष तेथे वाढतात. त्याचे उपचार झाले नाहीत तर ते दृढ होऊन आत धातूंमध्ये जाऊन त्यांना दूषित करतात. दोष तीन. दूष्ये ४–त्वचा, लसीका, रक्त, मांस ह्या चौघांची दुष्टि होते. ते ढिले होतात व दोषांचे आक्रमण होते. शरिराचे एकंदर सात घटक या रोगात दुष्ट असतात. **संख्यासंप्राप्ति**–मुख्य प्रकार दोन–( १ ) महाकुष्ठे ( २ ) क्षुद्रकुष्ठे. आणखी १८ प्रकार, ७ महाकुष्ठे. व ११ क्षुद्रकुष्ठे. ७ महाकुष्ठे–( १ ) अरुण ( तांबुस ) ( २ ) उदुंबर ( उंबरासारखे तांबडे लाल ) ( ३ ) ऋष्यजिव्ह–( अस्वल किंवा नीलाण्ड हरिणाच्या जिभेसारखे ) ( ४ ) कपाल ( काळ्याखापरासारखे ) ( ५ ) काकणक ( गुंजे-सारखे अतिशय काळे व लाल ) ( ६ ) पुंडरीक ( तांबडी कडा व मध्ये गुलाबी रंगाचे ) ( ७ ) दद्रु ( गजकर्ण ) ११ क्षुद्रकुष्ठे–( १ ) मोठे जाड व्रण असलेले ( २ ) मोठे कुष्ठ ( ३ ) एकसारखे सर्व शरीरभर पसरते ते ( ४ ) हातापायाच्या तळव्याची कातडी जाणारे. ( ५ ) धावऱ्याप्रमाणे पसरणारे ( ६ ) पसरणाऱ्या पुळयांचे ( ७ ) शिबे ( ८ ) हातापायांस चिरा पडणारे ( ९ ) ढेकणासारखे लाल काळे रक्त स्रवणारे ( १० ) ओली खरूज ( ११ ) सुकी खरूज. **चरकसुश्रुतात नावाचा फरक.**

चरकमते महाकुष्ठ–मंडल, क्षुद्रकुष्ठे–अलस, विपा-दिका, शतारुषी, विस्फोट, चर्मदल.

सुश्रुतमते महाकुष्ठ–अरुण–क्षुद्रकुष्ठे–स्थूलारुष्क, महाकुष्ठ, परीसर्प, रकसा.

**पूर्वरूपे**–घाम न येणे किंवा अतिशय येणे, त्वचा अतिशय चिक्कण किंवा खरखरीत होणे. वर्ण बिघडणे, खाज, टोचणी, स्पर्शनाश, त्वचेच्या काही भागात दाह, किंवा झिणझिण्या, रोमांच, जडपणा, उष्णता, सूज, पुनःपुनः धावऱ्यासारखे अंगावर येणे, नाक कान इत्यादीत मळ अधिक येणे, पिकलेल्या जळलेल्या चावलेल्या फुटलेल्या ढळलेल्या ठिकाणी व्रणात अतिशय वेदना, लहान जखमही बिघडते व रुझून येत नाही.

**दोष प्रकार**–वाताने कापाल, पित्ताने औदुंबर, कफाने मंडल, विचर्ची व चिरण्यांचे; वातपित्ताने

ऋक्ष, वातकफाने चर्मदल एककुष्ठ किटिभ शिबे अलसक व पायाला भेगा पाडणारे विपादिक; कफपित्ताने–गजकर्ण शतारुंषी, पुंडरीक, विस्फोट, खरूज व चर्मदल त्रिदोषाने गुंजेसारखे काकणकुष्ठ होते. दोषानुरूप त्वचेची लक्षणे असतात. वाताने रूक्षता, त्वचाशोष व खरखरीतपणा, शूळ इ०; पित्ताने दाह, लाली, स्राव, दुर्गंधी इ०; कफाने खाज, त्वचा थंड, पांढरेपणा, कृमि होणे इ० लक्षणे असतात. **प्रत्येकाची लक्षणे. कापाल**–काळे लालसर, रूक्ष, पातळ, खरखरीत, विषम व टोचणी-युक्त. **उदुंबर**–उंबराच्या फळासारखे; दाह, खाज, वेदना, लाली, पिंगट केस युक्त. **मंडल**–पांढरे तांबडे गोल चट्टे, एकमेकात मिसळलेले चट्टे, वर फुगून आलेले स्थिर. **ऋष्यजिव्ह,** रखरखीत, आत काळे लाल कडांचे, अस्वलाच्या जिभे सारखे. **पुंडरीक** कमळाच्या फुलाच्या पाकळ्यासारखे पांढरे तांबड्या कडांचे वर फुगून–आलेले दाहयुक्त; **शिबे**–जे पांढरे, तांबडे, पातळ, घासल्याने रजःकण निघतात तो भुगा दुध्याभोपळ्याच्या फुलासारखा दिसतो, हे बहुधा छातीवर होते. **काकणकुष्ठ**–गुंजेसारखे काळे लाल तीव्रवेदना युक्त न पिकणारे त्रिदोषयुक्त, असाध्य. औदुंबर, काकण, कापाल, व ऋष्यजिव्ह या चार कुष्ठात आग, चोखल्यासारखी वेदना, ठिक-ठिकाणी वाटोळी आग, धूर निघाल्याप्रमाणे वाटणे, लवकर उत्पत्ति, पिकणे, फुटणे, व कृमी होणे ही सामान्य लक्षणे होतात. **पुंडरीक, गजकर्ण**–या दोहोत वर फुगल्याप्रमाणे होणे, गोल मंडलाकार, खाज, हुळहुळ होणे, ही सामान्य लक्षणे असतात. या सर्व महाकुष्ठात–त्वचा आकसणे, चिरा पडणे, स्पर्श न कळणे, अंग गळणे, ही लक्षणे होतात. **क्षुद्रकुष्ठ–एककुष्ठ**–ते व्यापक माशाच्या खवल्या प्रमाणे व घाम नसलेले असते. **चर्मदल**–हत्तीच्या कातड्या-सारखे जाड, **किटिभ**–स्निग्ध, उग्र, खाजयुक्त, आणि स्रवणारे, काळे, रखरखीत, खरखरीत घट्ट्या-सारखे. **विपादिका**–हातापायाला भेगा, तीव्र वेदना. **अलसक**–खाजरे, लाल, गुठळ्या युक्त. **गजकर्ण**–खाज लाली पुळ्या चट्टे युक्त. **चर्मदल**–लाल खाज फोड वेदनायुक्त कातडी निघते. तळव्यांना आग, चोखल्यासारखी वेदना होते व त्याला स्पर्श सहन होत नाही. **खरूज**–पांढऱ्या तांबड्या काळ्या दाह व स्रावयुक्त खाजयुक्त पुळ्या. **विस्फोट**–पांढरे लालसर व त्वचा पातळ असलेले फोड. **शतारु**–तांबडे काळे दाह व वेदना युक्त अनेक व्रण. **विचर्चिका**–खाजयुक्त काळ्या व फार स्राव होणाऱ्या पुळ्या. **एककुष्ठ**–सगळे शरीर काळे लालसर होते. **विसर्प**–हे सर्वत्र धावऱ्यासारखे पसरते. त्वचा रक्त व मांस दुष्ट करून मूर्च्छा, छातींत जळजळ, बेचैनी, टोचणी करते व पिकते. **परिसर्प**–पुळ्या स्रवतात व शरीरभर हुळहुळ पसरतात. **शिबे**–हे बहुधा वरच्या भागात खाजयुक्त पांढरे, अपाय न करणारे व पातळ असते. **विचर्चिका**–हात पाय इ. अवयवांवर अतिशय खाज, व वेदना असलेल्या रूक्ष अशा चिरा पडतात. **विपादिका**–पायाच्या तळव्याला खाज दाह आणि वेदनायुक्त भेगा पडणे, **कच्छु**–ढुंगण, हात, पाय यावर दाहयुक्त फोड; **रकसा**–सर्व अंगावर होणारी कोरडी खरूज. **सप्तधातुगत–लक्षण**–त्वचेवर असलेले, स्पर्शनाश, घाम, रूक्षता, वर्णाचा बिघाड व थोडी खाज. **रक्तगत**–वरील लक्षणे असून रोमांच आणि पू होणे ही अधिक लक्षणे असतात. शिवाय ते जाड खरखरीत होते. त्यावर पुळ्या येतात आणि तोंड सुकते. **मांसगत**–त्यात टोचणी फोड आणि ते स्थिर असते. **मेदोगत**–त्याच्यातून पू होतो; मळ निघतो, दुर्गंधी येते, क्रिमी होतात आणि अवयवात फुटल्याप्रमाणे वेदना होते. **अस्थि-मज्जागत**–नाक फुटते, डोळे लाल होतात, जखमेत क्रिमि होतात आणि स्वर बिघडतो. **उपद्रव–वातज**–काळा, तांबूस वर्ण, रखरखीत-पणा, रूक्षपणा, शूल, टोचणी, रोमांच, त्वचा आखडणे, स्पर्शनाश होणे, अंगाला चिऱ्या पडणे, अवयव गळणे, अंग ताठरणे, थकवा आणि तोंड सुकणे. **पित्तज**–आग, घाम, ओलावा, पिकणे, कुजणे, स्राव होणे. **कफज**–पांढरेपणा, थंडावा, जडपणा, स्थिरत्व, फुगून येणे, स्नेह लावल्या सारखे वाटणे. **त्रिदोषज**–अंग फुटणे, स्राव होणे, अवयव गळून पडणे, तहान, ज्वर, अतिसार, दाह, दुबळेपणा, अपचन, रुचिनाश, क्रिमि होऊन ते त्वचा, रक्त, मांस, मेद, शिरा, स्नायु आणि तरुणास्थि खातात. **साध्यासाध्यत्व**–अंग फुटलेले, स्रवणारे, आणि पंचकर्म करूनही कमी न होणारे कुष्ठ तांबडा डोळा असलेल्या, स्वर बिघडलेल्या कुष्ठयाला

अयं सव्रणाऽव्रणपाकात्ययाऽश्रयजभेदाच्चतुर्विधः ( सुउ. ५.३ ) काळ्या बुबुळाचा विकार.

**कृष्णाढ्या**–स्त्री., वनस्पति० पिप्पली ( सुउ. १७.८–१० ) पिंपळी.

**कृष्णेक्षु**–पु., वनस्पति० इक्षुः ( रा. १४.१८७ ) काळा ऊस.

**कृष्णोदरश्वेतकपोत**–पु., सर्प०; दर्वीकरः ( सुक. ४.३४ ( १ ) काळा नाग.

**कृष्णोदुम्बरिका**–स्त्री., वनस्पति० काकोदुम्बरिका ( रा. ११.१४२ ) काळा उंबर, खर्वती, खरोती.

**–कृष्णका**–स्त्री., वनस्पति० राजिका ( ध. ४.६० ) मोहरी ( काळी )

**क्लृप्तनख**–वि., शस्त्रवैद्यलक्षणेष्वेकः छिन्नश्लक्ष्णनखः ( सुचि. ७.३० ) नखे काढलेला, गुळगुळीत नखाचा. शस्त्रवैद्याचे लक्षण.

**क्लृप्तीभावः**–पु., अप्रवृत्तिः ( चनि. १.२१ ) भेदः स्फुटनं यथा नखादीनाम् ( चनि. १.२१ ) मळमूत्रांची अप्रवृत्ति, फुटणे. नखे त्वचा इ०,

**केकिन्**–पु., पक्षि०, मयूरः ( र. ११.१२९ ) मोर.

**( केकि )-शिखा**–वनस्पति० बर्हिचूडा ( रापरि. ५.१३ ) मोरशिखा, मयूरशिखा.

**केतकसूची**–स्त्री., वनस्पति० ( असंउ. ६ ) केवड्याचे काटे.

**केतकिक्षार**–पु., केतकिजः क्षारः, स च वातगुल्महरः ( सुउ. ४२.४५ ) केतकीचा क्षार. केवड्याचा क्षार वातगुल्महर.

**केतकी**–स्त्री., वनस्पति०; जातिः ( रा. १०.२१३ ) सुगन्धिपुष्पवृक्ष०; प्रावृषि केतकी पुष्पिता भवति। इयं श्वेतस्वर्णभेदेन द्विधा। श्वेताया गुणाः–कटुः स्वादुस्तिक्ता लघुः कफघ्नी; स्वर्णकेतकीगुणाः– तिक्तोष्णा चक्षुष्या ( भाप्र ) वैक्रान्तद्रावणे केतकीरस उपयुक्तः ( र. ४.७६–७७ ) केतक्याः कुसुमं वर्ण्यं केशदुर्गन्धनाशनं च। स्वर्णकेतक्यास्तु मदकारि सुखकरं च। तदतिशीतं कटु कफपित्तापहं रसायनं बल्यं देहदार्ढ्यकरं च ( धपरि. ५.१ ) केवडा. सुगंधी फूल. पांढरे व सुवर्णवर्णी असे दोन प्रकारचे. **पांढरा केवडा** कडू, तिखट, गोड, हलका, कफनाशक. **सोनेरी केवडा** कडू, उष्ण, डोळ्यांना चांगला. **फुल** पांढरे केसांचा दुर्गन्ध नाशक व वर्ण चांगला करणारे. **सोनेरी फूल** मद उत्पन्न करणारे सुखकर. अति थंड, तिखट, कफपित्तनाशक, रसायन, बलवर्धक, शरीर दृढ करणारे आहे.

वैक्रांतमण्याचे द्रावण करण्याकरिता केवड्याचा रस उपयुक्त.

**–स्तन**–पु., केतक्याः आदौ स्तनाकारतुल्यः पश्चाच्च प्ररोहरूपः स्थूलः अवयवः ( र. ३०.५८ ) केवडीचा स्तन. प्रथम स्तनाकार अवयव होतो, नंतर जाड पारंबीसारखा लांब वाढतो.

**केतु**–पु., वनस्पति० अग्निमन्थः ( ध. १.११० ) अरणी, टाकळी.

**केदार**–पु., क्षेत्रम् ( सुसू. ४५.४ ) शेत. जलाशय० अवनिपतितजलसंचयस्थानम् ( सुसू. ४५.४ ) पावसाचे पाणी सांठलेले डबके. षष्टिकभेदः ( सुसू. ४६.८ ) साठे तांदुळाचा एक प्रकार.

**–कटुका**–स्त्री., वनस्पति० कटुका ( रा. ६.५६ ) कुटकी.

**–कुल्या**–स्त्री., न्याय० कुल्याभिः कृत्रिमाभिरल्पसरिद्भिः केदारो यथोपस्निह्यते तथा सिराभिः शरीरमुपस्निह्यते ( सुशा. ७.३ ) एक न्याय. ज्या प्रमाणे पाटाने ( कुल्या ) झाडांची आळी, शेतांतले वाफे ( केदार ) ही ओली होतात व त्यातल्या झाडांचे पोषण होते; तसेच शरिरात शिरांनी धातु, अवयव इत्यादींचे पोषण होते; हा केदारकुल्या न्याय.

**–ज**–न., वनस्पति० पद्मकम् ( रा. १२.१४९ ) कमळ.

**केबुक**–पु., वनस्पति० तिक्तस्कन्धे द्रव्य० पत्तूरः ( चवि. ८.२०१५ ) शाक० ( चचि. १४.१० ) गुणाः–रक्तपित्तहरो हृद्यो सुलघुः कुष्ठमेहज्वरश्वासकासारुचिहरः ( सुसू. ४६.२६२,२६३ ) एक कडु वनस्पती. भाजी. **गुण**–रक्तपित्तनाशक, चांगली, हलकी, कुष्ठ, मेह, ज्वर, श्वास, कासनाशक, अरुचिहर, हृदयाला हितकर.

**केबुकाकन्द**–पु., कन्द० अस्य निर्यासः श्लीपदे पानार्थमुपयुज्यते ( सुचि. १९.६२ ) केबुकाचा कंद. याचा काढा श्लीपदात–गजपदात–वारुळ या रोगात देतात.

**केम्बुक**–न., वनस्पति० गुणाः–तिक्तं, पाके कटु, शीतं, वातकृत् कफपित्तघ्नं च ( अहसू. ६.७८ ) **गुण**–कडु, पचनानंतर तिखट, थंड, वातकर, कफपित्तनाशक आहे.

**केलूट**–पु. न. **कन्दशाक० जलोदुम्बरः, गुणाः–रूक्षं ग्राहि हिमं गुरु** ( अहृसू. ६.९२ )
एक उंबराचा भेद. किस्मक हे एक संस्कृत नांव. हा वर्ग भाजीच्या कंदांचा. **गुण**–रूक्ष, मळ बांधणारा, थंड व जड.

**केवल**–वि., **अमिश्रितं, एकमात्रम्** ( सुसू. ३५.४७ )
ज्याच्या जोडीला कोणी नाही, ज्यात मिश्रण नाही, ते एकच.

**–वात**–पु., **शुद्धवातः** ( अहृसू. ६.६५ )
ज्या वाताचे जोडीला कफ पित्त आम इ० कोणाची ही दुष्टि नाही असा.

**–वातरोग**–पु., **पित्तादिदोषेण असंसृष्टः केवलवातारब्धः रोगः** ( सुचि. ३३.१४ )
ज्या वातरोगात पित्तादि दोष दुष्ट वाताच्या जोडीला नाहीत असा.

**केवलामलकरसायन**–न., **रसायन०, यतेन्द्रियो ब्रह्मचारी सावित्रीं मनसा ध्यायन् पयोवृत्तिः संवत्सरं गवां मध्ये वसेत् । संवत्सरान्ते पौषीं माघीं फाल्गुनीं वा तिथिं त्र्यहोपवासं कारयेत् । शुक्लपक्षे आमलकीवनं प्रविश्य बृहत्फलाढ्यमामलकीद्रुममारुह्य शाखागतं फलं पाणिना गृहीत्वाऽमृतागमपर्यन्तं ब्रह्म जपँस्तिष्ठेत् । तदा क्षणमामलकेऽमृतमवश्यं तिष्ठति । अमृतसंयोगात्तानि शर्करामधुकल्पानि स्नेहवन्ति मृदूनि च भवन्ति । तेभ्यो यावन्ति भक्षयेत्तावन्ति वर्षसहस्राण्यागतयौवनैर्जीवेत् । एषां सौहित्यं गत्वा अमरसंनिभो भवति । अस्य श्रीर्वेदाः वाग्रूपिणी देवता च स्वयमुपतिष्ठन्ते** ( चचि. १ (३) ९.१४ )
केवल आवळ्याचेच रसायन. सेवनेच्छु व्यक्तीने प्रथम एक वर्ष केवळ गाईच्या दुधावर गाईंच्या कळपामध्ये रहावे व ब्रह्मचारी जितेन्द्रिय राहून, नित्य मनात सावित्रीचे ध्यान करावे. वर्षाचे पौष माघ किंवा फाल्गुनात शेवटी तीन दिवस उपवास करून शुक्लपक्षात मोठे व पुष्ट आवळे असलेल्या आवळ्याच्या वनात प्रवेश करावा. आवळ्याच्या झाडावर चढावे. एका शाखेचे आवळे हातात घेऊन ब्रह्माचा म्हणजे ओंकाराचा जप करीत बसावे. आवळ्यात अमृत निर्माण होईपर्यंत बसावे. एक क्षण असा येतो की त्यात जरूर अमृत निर्माण होते. अमृताचा आवळ्यांशी संयोग झाल्यामुळे ते साखर मध यांसारखे गोड मऊ व स्निग्ध होतात. त्यातून एकेक खाण्याला सुरवात करावी; जितके आवळे खाल्ले जातील तितकी हजार वर्षे तारुण्ययुक्त आयुष्य लाभेल. पोटभर खाल्ले तर तो देवांसारखा आयुष्मान होईल. त्याच्या ठिकाणी वेदवाक्यरूपिणी श्री स्वतःच प्रकट होते.

**–केवा**–स्त्री., **वनस्पति०, केविका** ( रापरि १०.३३ )
अतिसुगंधी असल्यामुळे भुंगे आकृष्ट होतात, पण भुंगे फुलावर बसले की ते मरतात अशी वनस्पती.

**–केविका**–स्त्री., **वनस्पति० गुणाः–मधुरा शीता पित्तहरा वातश्लेष्मरुक्पित्तच्छर्दिघ्नी दाहश्रमहरा च** ( रापरि. १०.३३ )
पहा 'केवा' **गुण**–गोड, थंड, पित्तनाशक, वातकफ, वेदना व पित्ताची ओकारी नाशक, दाह व श्रमनाशक.

**केवुक**–पु., **वनस्पति०, केसुरः** ( ड. सुउ. ५४.२५ )
कृमिघ्न वनस्पती

**केवुकाकन्द**–पु., **वनस्पति० केवुकाकन्दः** ( सुचि. १९.६२ ) पहा 'केवुकाकन्द'

**केश**–पु., **रोम** ( चसू. १.६९ ) **अस्थ्नो मलः** ( चचि. १५.१९ ) ( सुसू. २९.९–१५ )
केश, केस. केश हा अस्थिधातूचा मळ.

( **केशी** )–स्त्री., **वनस्पति० गन्धमांसी** ( ध. ३.४७ )
जटामांसी.
शतावरी ( असंउ. ९ ) शतावरी.
भूतकेशी (चचि. ९.४५) अपस्मारनाशक वनस्पती.

**–घ्न**–न., **केशनाशकम्** (अहृसू. ६.१३०) केशनाशक.

**–दोष**–पु., **रोग० केशदुष्टिः, अस्थिप्रदोषजरोगेष्वेकः** ( चसू. २८.१६ )
केस विकृत होणे, हा विकार अस्थि धातूच्या विकृतीमुळे होतो.
**लक्षण० केशशातः, केशच्यवनमिति यावत्** ( अहृसू. २०.४ ) केस गळणे.

**–प्रसाधनी**–स्त्री., **वनस्पति० कङ्कतिका** ( सुचि. २४.२९ ) फणी, कंगवा.

**–भू**–स्त्री. **केशभूमि.** ( अहृसू. २२.३० )
केश असलेली त्वचा–कातडी, केस उत्पन्न होण्याचे स्थान.

**–भूमि**–स्त्री., **त्वक्, केशोत्पत्तिस्थानम्** ( चचि. २६.१३२ ) **मस्तकम्** ( असंसू. २९.१७ ) **केशभूमिः स्निग्धा लोहिता निर्मला निर्व्रणा च प्रशस्यते** ( कासू. २८.६ )

त्वचा. केश उत्पन्न होण्याचे स्थान; डोके. केश उत्पन्न होणारी त्वचा स्निग्ध, लाल; निर्मल, व्रणरहित असणे उत्तम.

**–भूमिस्फुटन**–रोग०, **अशीतिवातविकारेष्वेकः** ( चसू. २०.११ )
एक रोग. केस असलेल्या त्वचेला भेगा पडणे; ऐशी वातविकारांपैकी एक.

**–मथनी**–स्त्री., वनस्पति० **शमी** (रा. ८.१५२) शमी.

**–मुष्टि**–पु., वनस्पति० **महानिम्बः** ( ध. १.३१ )
मोठा निंब, बकाणा निंब.
**विषमुष्टिः** ( रापरि. ४.३९ ) कुचला.

**–रञ्जन**–पु., वनस्पति० **भृङ्गारकः** (ध. ४.११) माका.
न., **श्वेतकेशानां कृष्णीकरणम्** ( र. ३०.६१ )
पांढरे केस काळे करणे.

**–रुह्**–स्त्री., वनस्पति० **नीलिनी** ( ध. १.२३३ )
काळा दाणा.

**–( रुहा )**–स्त्री., वनस्पति० **महाबला** ( ध. ४.२ )
मोठी बला, बलामोटा.
**दन्ती** ( ध. १.२२५ ) दांतीमूळ.

**–रूपा**–स्त्री., **वृक्षादनी** ( रा. ५.१४२ )
वनस्पती. बांडगूळ.

**–लुञ्चन**–न., **केशोत्पाटनम्** (असंउ. २) केस उपटणे.

**–वर्धनी**–स्त्री., वनस्पति० **महाबला** ( रा. ४.४२४ )
मोठी बला.

**–विधृति**–स्त्री., लक्षण० **रोम्णामवलम्बनम्, स्वेदस्य कचरोमधारणमपि** ( अहसू. ११.५ )
केस धारण करणे. हे स्वेदाचे घाम या घटकाचे कार्य आहे.

**–शात**–पु., लक्षण० **केशच्यवनम्** (सुक. ३.४१–४२ )
केस गळणे.

**–सीमन्तकृत्**–पु., रोग० **ज्वरभेदः सीमन्तः केशमार्गः, केशेषु सीमन्तान् करोतीति केशसीमन्तकृत्, अयमसाध्यो ज्वरः** ( चचि. ३.५२–५३ )
रोगकार्य. ज्वरकार्य. भांग. केसात भांग निर्माण करणारा ज्वर, असाध्य.

**–हन्त्री**–स्त्री., वनस्पति० **शमी** ( ध. ५.९५ ) शमी.

**केशनी**–स्त्री., वनस्पति० **मांसी** ( रा. १२.९० )
जटामांसी.

**केशर**–पु., न., वनस्पति० **पद्मकेशरम्** ( सुउ. ४५.३३ )
कमळाचे केशर.
**नागकेशरम्** ( चसू. ५.२० ) नागकेशर.
**बकुलः** ( सुउ. ४७.६१ ) बकुळ.

**केशरिन्**–पु., **जलचरपक्षि०** ( चसू. २७.४२ )
पाण्यात रहाणारा पक्षी.

**केशरुहा**–स्त्री., वनस्पति० **महाबला** ( रा. ४.४२४ )
मोठी बला.

**केशवावास**–पु., **पिप्पलः** ( ध. ५.७८ ) पिंपळ.

**केशाद**–पु., **रक्तजक्रिमि० अयं ताम्रवर्णः, इमे अणवो वृत्ताश्चापादाश्च, सूक्ष्मत्वाच्चैके भवन्त्यदृश्याः** ( चवि. ७.११ )
केस खाणारा कृमी. रक्तदुष्टीने होतो. हा तांबडा, अणु, वाटोळा, पाय नसलेला, सूक्ष्म, अदृश्य असतो.

**केशान्त**–पु. **शङ्खयोरुपरिभागः** ( सुसू. ३५.१२ )
केसांची मर्यादा. कानशिळाच्या वरचा भाग.

**केशार्हा**–स्त्री., वनस्पति० **महानीली** ( रा. ४.३५३ )
मोठी नीली. मोठा काळा दाणा.

**केशिका**–स्त्री., **शतावरी** ( रा. ४.४३९ )
वनस्पती. शतावरी.

**केशोण्डुक**–न., **केशैः कृतं विटकं पुञ्जो वा, कण्ठगतशल्यादेर्वमनेनोद्धरणार्थमुपयुज्यते । वमतश्च शल्यैकदेशसक्तं ज्ञात्वा सूत्रं सहसा त्वाक्षिपेत्** ( सुसू. २७.१९ )
केसांचा पुंजका. घशात अडकलेले शल्य काढण्याकरिता याचा उपयोग करतात. हा केसांचा पुंजका दोरीला बांधून घशात घालावा, त्यामुळे ओकारी येईल, त्याबरोबर घशात अडकलेले शल्य केसांच्या पुंजक्यात अडकते, नंतर दोरी बाहेर ओढून शल्य बाहेर काढावे.

**केशोन्दुक**–न., **केशोण्डुकम्** ( अहसू. २८.३७ )
पहा 'केशोण्डुक'.

**केश्य**–वि., **केशहितम्** ( अहसू. ५.६० )
जे केसांना हितकर ते.
वनस्पति० **अगरुभेदः, कृष्णागरुः** ( रा. १२.४० )
द्र० 'अगरु'. काळा अगरु–पहा 'अगरु'.
**वालकम्** ( ध. १.४७ ) वाळा.
**भृङ्गराजः** ( रा. ४.२० ) माका.

**केसर**–पु., वनस्पति० **मातुलुङ्गः** ( रा. ११.२६ )
महाळुंग.
**बकुलः** ( रा. १०.२६२ ) बकुळ.
**पद्मकेसरम्** ( रा. १०.२६२ ) कमळाचे केशर

**–नागकेसरम्** ( ध. २.४८ ) नागकेशर.
खनिज० **कासीसम्** ( ध. ३.१२३ ) हिराकस.

–वर–न., वनस्पति० कुङ्कुमम् (रा. १२.२१) केशर.
–केसराम्ल–पु., वनस्पति० मातुलुङ्गः (ध. ५.२२) महाळुंग.
**केसरिका**–स्त्री., वनस्पति० महाबला (रा. ४.४२४) मोठी बला. मुद्रिका.
**केसरिन्**–पु., वनस्पति० मातुलुङ्गः (ध. ५.२२) महाळुंग.
**कैंशुक**–वि., पलाशसंबन्धि (सुउ. १०.९) पळसाचे.
**कैकशेय**–पु., ऋषि० (चसू. १.१२) एक ऋषि.
**कैटभ**–पु., असुरविशेषः (सुक. ३.१८) एक दैत्य.
**कैटर्य**–पु., वनस्पति०; पर्वतनिम्बः (चसू. ४.१८) फार मोठ्या पानांचा निंब.
कट्फलम् (चसू. ४.१०) कायफळ.
**कैडर्य**–पु., न., वनस्पति० सुरभिपत्रम् (असंउ. ६)
निम्बभेदः, कैडर्यनिम्बः (रा. ९.४८) कढीनिंब.
–निम्ब–पु., वनस्पति० गुणाः–कटुस्तिक्तः कषायः शीतो लघुः सन्तापशोषकुष्ठरक्तविकारक्रिमिभूतविषादिरोगघ्नः (रा. ९.४८)
हिं.—कृष्णनिंब, मीठा निंब.
म.—**कढीनिंब.**
गु.—मीठो लिंबडो.
बं.—घोडानिम.
त.—करुवेप्पिलै.
**गुण**–तिखट, कडु, तुरट, थंड, हलका, आग, रक्तविकार, क्रिमि, कुष्ठ, शोष, (क्षय) भूतबाधा, विषनाशक.
महानिम्बः (सुउ. २८.४) बकाणा निंब.
पूतिकरञ्जः (असंउ. १०, इन्दु) घाणेरा करंज.
कटभी (रापरि. ९.३७) मालकांगोणी. विष्णुक्रांता.
**कैण्डर्य**–पु., वनस्पति० कैडर्यनिम्बः (असंसू. १५) कढीनिंब.
**कैण्डर्यक**–पु., वनस्पति० कैडर्यनिम्बः (असंचि. १३) कढीनिंब.
**कैतक**–न., वनस्पति० केतकीपुष्पम् (असंसू. १२.८९) केवड्याचे फूल.
**कैदार**–पु., धान्य० शालिभेदः, अनूपजः शालिः, गुणाः–मधुरो वृष्यो बल्यः पित्तनिबर्हण ईषत्कषायोऽल्पमलो गुरुः कफशुक्रलः (सुसू. ४६.१७)
द्र० ' शालि. '
धान्य. साळ. **गुण**–हे तांदूळ गोड, थोडे तुरट, बलवर्धक, मळ कमी करणारे, जड, कफ व शुक्रवर्धक, पित्तनाशक. पहा ' शालि '.

**कैरला**–स्त्री., वनस्पति० विडङ्गम् (ध. २.११) वावडिंग.
**कैरली**–स्त्री., वनस्पति० विडङ्गम् (ध. २.११) वावडिंग.
**कैरव**–न., वनस्पति० कुमुदम् (रा. १०.२४६) कमळ.
विडङ्गम् (काखिल. ११.९७) वावडिंग.
**(कैरवी)**–स्त्री., वनस्पति० वनमेथिका (रा ५.१८५) रानमेथी.
**कैरविणी**–स्त्री., वनस्पति०; उत्पलिनी (रा १०.२५०) द्रष्टव्यं ' कुमुद '
निळी कमलिनी.
**कैरात**–पु., वनस्पति० किराततिक्तः (रा. ९.५०) काडे चिराईत.
प्रतुदपक्षि० (चसू. २७.५०) भक्ष्याला टोचून खाणारा एक पक्षी.
–तिक्त–पु., वनस्पति० किराततिक्तः (रा ९.५०) काडे चिराईत.
**कैलास**–पु., पर्वत० (चचि. १३.३) पर्वत.
**कैलिञ्जी**–स्त्री., किलञ्जसाधनानां कुशकाशादिद्रव्याणामियं कैलिञ्जी (सुचि. ३२.७)
घाम काढण्याकरितां दर्भ इत्यादिकांनी केलेली नळी.
**कैवर्तिका**–स्त्री.. वनस्पति०, गुणाः– कषाया लघुर्वृष्या कफनाशिनी कासश्वासहरा मन्दाग्निदोषनुच्च (रापरि. ३.३५)
एक लता. तुरट, हलकी, कफनाशक, शुक्रवर्धक, खोकला, श्वास व मंदाग्नि नाशक.
**कैवर्तिमुस्त**–न., वनस्पति० जलमुस्तम् (ध १.४३) नागरमोथा.
**कैवल्य**–न., मोक्षः (सुशा. १.८) मोक्ष.
**कैशिकी**–स्त्री., व्यधनानां कुठारिकादीनां सूचीकुशपत्रादीनां केशप्रमाणा धारा (सुसू. ८.१०)
कापणाऱ्या तोडणाऱ्या कुऱ्हाड इ० शस्त्रक्रियेतील शस्त्रांची केसाइतकी पातळ धार.
**कोककर्कटिका**–स्त्री., वनस्पति० पिण्डखर्जूरिका (रा. ११.७१) पेंडखजूर.
**कोकनद**–न., वनस्पति० पद्मभेदः, रक्तपद्मम् (चचि. ६.१७) (ध. ४.१५२)
कमळाचा प्रकार, तांबडे कमळ.
**कोकिल**–पु., प्रतुदपक्षि० स्त्री., कोकिला (चक. १.८) (सुक. १.३१) द्र० ' प्रतुद '
कोकीळ, कोकिळा.
सविषमूषिकभेदः, तद्दष्टलक्षणम्–उग्रग्रन्थयो ज्वरो दारुणो दाहश्च (सुक. ७.२४–२५)

विषारी उंदीर प्रकार. **दंशलक्षण**–उग्र गांठी, ताप, त्रासदायक दाह.

**सविषकीट० गुणाः–सौम्यः श्लेष्मप्रकोपणः सन् कफविकारान् करोति** ( सुक. ८.१२–१५ )

विषारी किडा. **गुण**–सौम्य, कफप्रकोपी, कफविकार करतो.

**अर्धदग्धं काष्ठम्** ( र. २.१२५ )

अर्धवट जळालेले लाकूड, कोळसा.

**–गुडिका**–योग० **द्राक्षाक्षुद्रादियुक्तः, नेत्ररोगेषु उपयुक्तः** ( काखि. १३.५०–५१ )

एक औषधि गुटिका. द्राक्षे रिंगणी इत्यादींनी युक्त योग. नेत्रविकारात उपयुक्त.

**कोकिलाक्ष**–पु., **वनस्पति० गुणाः–मधुरः शीतः बल्यः रुच्यः सन्तर्पणः वृष्यः कफघ्नः पित्तातिसारनुच्च** ( र. ११.१०० )

हिं.—तालमखाना, कैलया.

म.—**विखरा, तालीमखाना.**

गु.—एखरो.

बं.—कुलियारवाडा, कुलेकाँटा, कुलव, शूलमर्दन.

त.—नीरमुल्ली.

तालीमखाना गोड, थंड, बलकर, रुचिकर, पौष्टिक, शुक्रवर्धक, कफनाशक, पित्तातिसार जिंकणारा.

**कोकिलाक्षक**–पु., **वनस्पति० इक्षुः** (रा. १४.१८७) ऊस. **खग्गली, कोकिलाक्षः** ( ड. सुउ. ५८.४४ )

ऊस, तालीमखाना.

**कोकिलानन्द**–पु., **राजाम्रः** ( रा. ११.८ )

उत्कृष्ट आंबा, रायआंबा.

**कोकिलावास**–पु., **आम्रः** ( रा. ११.३ ) आंबा.

**कोकिलेक्षु**–पु., **वनस्पति० इक्षुः** ( रा. १४.१८७ ) ऊस.

**कोकिलेष्टा**–स्त्री., **वनस्पति० जम्बूः** ( रा. ११.१३० )

जांबूळ. जांभूळ.

**कोकिलोत्सव**–पु., **वनस्पति० राजाम्रः** ( रा. ११.८ )

उत्कृष्ट आंबा, रायआंबा.

**आम्रः** ( रा. ११.२ ) आंबा.

**कोटर**–पु., **वनस्पति० अङ्कोलः** ( रा. ९.३८३ ) अंकोल.

**–पुष्पी**–स्त्री., **वनस्पति० वृद्धदारुकः** ( ध. ४.१०७ )

वरधारा.

**कोटि**–स्त्री. **वनस्पति० स्पृक्का** ( रा. १२.११३ )

त्रायमाण. पिंडकी.

स्त्री., **संख्या०** ( सुउ. ६०.२२ )

शंभर लाख, शंभर लक्ष.

**कोटिक**–पु., **प्राणि० मण्डूकभेदः तेन दष्टस्य दाहश्छर्दिर्मूर्च्छा, दंशे कण्डूर्मुखतः पीतफेनागम इत्यादीनि लक्षणानि भवन्ति** ( सुक. ८.३१ )

बेडकाचा प्रकार. याच्या दंशाने दाह, खाज, तोंडाला पिवळा फेस, ओकारी, मूर्च्छा इ. लक्षणे होतात.

**( कोटिका )**–स्त्री., **वनस्पति० स्पृक्का** ( ध. ३.६२ )

त्रायमाण, पिंडका.

**कोटी**–स्त्री., **कोटिः** ( सुउ. ६०.२२ ) शंभर लाख.

**कोट्टकारक**–पु., **जाङ्गलमृग०** ( चसू. २७.४५ )

एक निर्जल रानातील मृग.

**कोठ**–पु., **रोग० लक्षणम्–वरटीदष्टसंकाशः कण्डूमानत्वकफपित्ताल्लोहितः क्षणिकोत्पादविनाशश्च** ( चचि. ३.१०८ ) **रक्तदोषजरोगेष्वेकः** ( चसू. २८.१३ ) **पीडकः, लवणरसस्यातियोगतो भवति** ( सुसू. ४२.१० )

**लक्षण०** ( अहसू. ४.१७ )

रोग. **लक्षण**–गांध, गांधीलमाशी चावल्यासारखी. खाजरी लालसर अशी उत्पन्न झाल्यावर काही वेळाने नाहीशी होणारी गांध. रक्तकफपित्तज, रक्तदोषाने होते. वांती होऊ दिली नाही तर, मीठ व खारट पदार्थ अधिक खाल्ल्याने होते.

**–फल**–न., **फल०** ( चसि. ११.१२ ) फळ.

**(फला)**–स्त्री., **वनस्पति० कोशातकी** ( चक. ४.३ )

दोडके.

**कोड**–पु., **प्राणि० प्रसहवर्गीयः, मांसगुणाः–मधुरः, कटुपाकी, वातघ्नश्च** ( काखिल. २४.३८,३९ )

आक्रमणाने भक्ष्य मिळविणारा. याचे मांस गोड, पचल्यानंतर तिखट, वातघ्न.

**कोथ**–पु., **पूतीभावः** ( चसू. २०.१५ ) **मृतशरीरक्लेदः** ( असंसू. ६.२१ ) **पित्तकर्म** ( हे. अहसू. १२.५२ )

कुजणे. मेलेल्याचे शरीर कुजणे हे पित्ताचे कर्म.

**कोथक**–पु., **नेत्ररोग०** ( काखिल १३.४९ )

डोळ्याचा एक रोग.

**कोद्दालक**–पु., **धान्य० शालिभेदः** ( चनि. ४.५ )

**द्र०** ‘शालि’ पहा ‘शालि’.

**कोद्रव**–पु., **कुधान्य० गुणाः–मधुरस्तिक्तः शीतो रूक्षो गुरुर्ग्राही वातकृत् पित्तकफघ्नो विषघ्नश्च** ( ध. ६.८६ ) **कोद्रवो रक्तपित्तं हन्ति, विदाहि रक्तपित्तं करोति** ( असंसू. ७.३० )

हिं.—कोदो, कोदव.

म.—**हरीक, भगर.**

गु.—कोद्रो.
बं.—कोदो धान, गोम. त. वरकु.
कोद्रु. गोड, कडु, थंड, रूक्ष, जड, मळ बांधणारा, कफपित्त, विषनाशक व वातकर आहे. रक्तपित्त-नाशक, विदाहकारक पदार्थाबरोबर अधिक खाल्याने घशाशी आंबट येते व कांही दिवसांनी रक्तपित्त होते.
**वन्यतण्डुलः, अयं मलविशोषी विण्मूत्रसंगकृच्च** ( र. १६.१ )
रानतांदूळ. हा मलमूत्राचा अवरोध करणारा आहे.
**कोरदूषः, सर्वप्राणिनां सामान्यतः पथ्यः** ( सुसू. २०.५ )
सर्वांना सर्वसाधारण पथ्यकर.
**तृणधान्य० गुणाः–शीतो लघुः पवनकृल्लेखनः कफ-पित्तहृत्** ( अहृसू. ६.११ )
**गुण**–थंड, हलके, वातकर, दोष खरडून काढणारे, कफपित्तनाशक.

**कोनालक**–पु., जलचर० **श्यामपृष्ठश्वेतोदरः प्लवेष्वेकः** ( सुसू. ४६.१०५,१०६ )
पाण्यात रहाणारा. पाठ काळी व पांढरे पोट असलेला प्राणी.

**कोप**–पु., **मनोभाव०; क्रोधः** ( चनि. १.१५ )
मनातील एक भाव. संताप, क्रोध.
**प्रकोपः दोषसंस्थाने एव संचयापेक्षया अधिक-दोषवृद्धिः** ( सुसू. २१.१९ )
दोषाची स्वतःच्या स्थानात संचयावस्थेपेक्षा अधिक प्रमाणात वृद्धि होणे.
**वातादेरुन्मार्गगामिता** ( असंसू. २०९-१० )
दोष स्वस्थानात परिपूर्ण वाढल्यावर त्या स्थानातून अन्य स्थानात जाणे.

**कोपन**–वि., **यद्दोषादीन् कोपयति, नामातिशये वर्धयति तत्** ( अहृसू. १.१६ )
दोषादिकांना अतिशय प्रमाणात वाढविणारे, प्रकुपित करणारे.

**कोपनक**–पु., वनस्पति० **चोरकः** ( ध. ३.७१ )
चोरओवा.

**कोमल**–वि., **अनिष्पन्नवर्णं पञ्चवर्णं वा** ( र. ४.५५ )
वर्ण उत्पन्न न झालेले किंवा पाच वर्ण असलेले.
**–पत्रक**–पु., वनस्पति० **शिग्रुः** ( रा. ७.६० )
शेवगा.

**कोयष्टि**–पु., प्रतुदपक्षि० ( चसू. २७.५० )
भक्ष्याला टोचून टोचून खाणारा पक्षी. कोंढा.
पु., पक्षि० **कोयष्टिः** ( सुसू. ४६.६७ )
लांब मांड्या असलेला पक्षी. कोयंग.

**कोर**–पु., शारीर० **संधिप्रकारभेदः, कोरो नाम गर्तः, तदाकृतयः कोराः, अङ्गुलिमणिबन्धगुल्फजानुकूर्परेषु कोराः** ( सुशा. ५.२७ )
खांच असलेले सांधे, करंगळ्या, मनगट, कोपर, गुडघा, घोटा यात असे सांधे आहेत.
**–दूष**–पु., धान्य० **कोद्रवः** ( चसू. २७.१६ ) कोद्रु.
**–सन्धि**–पु., शारीर० **अस्थिसन्धिभेदः, कोरः** ( सुशा. ५.२७ असंशा. ५.७७ )
हाडांच्या सांध्यांचा एक प्रकार. खळगा असलेला सांधा.

**कोरक**–न., **कलिका** ( सुउ. ११.१५ ) कळी.
वनस्पति० **चोरकः** ( र. २९.९४ ) चोरओवा.
**कक्कोलकः** ( र. २७.१३९-१४१ ) कंकोळ.
**लवङ्गम्** ( असंक. १ ) लवंग.
**–क्षारः**–न., क्षार० **मालतीमुकुलक्षारः** ( चचि. ७.१६८ ) मालतीच्या कळ्यांचा क्षार.

**कोरङ्गी**–स्त्री., वनस्पति० **पिप्पली** ( ६.१०९ ) पिंपळी.
**एलाभेदः सूक्ष्मैला** ( ध. २.४४ ) द्र० '**एला**'
लहान वेलदोडा. पहा 'एला'.
**कुरण्टकः** ( १५.३९ ) कोऱ्हांटी.

**कोल**–न., वनस्पति० **बदरम्** ( चसू. २.१२ ) बोर.
**चव्यम्** ( रा. ६.११५ ) चवक.
**मरिचम्** ( र. २६.१७-१८ ) मिरे.
द्रव्यगण० **पञ्चकोलम्** ( सुउ. ३९.२१७ )
पाच द्रव्यांचा एक गण. पिंपळी, पिंपळमूळ. चवक, चित्रक व सुंठ.
मान० **द्वौ शाणौ** ( चक. १२.८९ ) अर्धा तोळा.
मान० **वटकः निष्कद्वयं कोलः** ( र. ११.४ )
८ मासे. तोळा.
**अर्धकर्षः** ( सुउ. ५१.२४ ) अर्धा तोळा.
**तोलकः** ( चक. २.११ ) एक तोळा.

( **कोला** )–स्त्री., **चव्यम्** ( सुउ. ५१.३३ ) चवक.
**पिप्पली** ( ध. २.७३ ) पिंपळी.

( **कोली** )–स्त्री., **बदरी** ( अहृसू. १५.४१ ) बोरीचे झाड.
**–कन्द**–पु., वनस्पति० **गुणाः–कटुः उष्णः कृमिदोष-वान्तिविच्छर्दिविषदोषनाशनश्च** ( रापरि. ७.३८ )
हिं.—जंगली पियाज.
म.—**कोलकन्द**. जंगली कंद.
गु.—बनकन्दो.

बं.—जंगली पियाज.
त.—नारी वेंगायम्.
फा.—पियाज इ. दस्ता इ. हिंदी.
कोलकंद तिखट, उष्ण, कृमी, वांती, विषदोषनाशक.

**–तैल**–न., **बदरमज्जातैलम्** ( सुसू. ४५.१२० )
बोराच्या बीचे तेल.

**–पालिका**–स्त्री., **वनस्पति० दधिपुष्पी** (रा. ७.२०४)
खाजकुहलीचा एक प्रकार.

**–बदरासव**–पु., **आसुत०** ( सुसू. ४६.४३३ )
बोरांचे आसव.

**–भाण्डिका**–स्त्री., **वनस्पति० मञ्जिष्ठा**
( रा. ६.१७ ) मंजिष्ठा.

**–मज्जा**–स्त्री., **कोलाष्ठीलाभ्यन्तरीयो मृदुभागः कोलाभ्यन्तरम्** ( चचि. २०.२९ )
बोराच्या अठळीमध्ये असलेला मऊ गर.

**–मूल**–न., **वनस्पति० पिप्पलीमूलम्** ( ध. २.७५ )
पिंपळमूळ.

**–वल्ली**–स्त्री., **वनस्पति० चविका** ( चचि. ३.२१० )
चवक.

**–सीधु**–पु., **कोलकृतमद्यम्** ( चक. ८.९ )
बोराची दारू.

**कोलक**–न., **कङ्कोलः** ( र. ११.९४ ) कंकोल.
**अङ्कोलः** ( रा. ९.३८४ ) अंकोल.
**बदरम्** ( ध. ५.९६ ) बोर.
**मरिचम्** ( ध. २.८८ ) मिरें.

**कोलाम्ल**–पु., **वनस्पति० बदरभेदः अम्लबदरम्**
( चचि. ३.१८६–१८७ ) **द्र० 'बदर'**
एक आंबट जातीचे बोर.

**कोलास्थिदल**–न., **मान० बदरास्थिमज्जाविदलप्रमाणम्**
( सुसू. ७.१४ )
बोराच्या अठळीच्या मधील बीच्या अर्ध्या ( दला ) भागा इतके–इतक्या प्रमाणाचे.

**कोलास्थिमज्जा**–स्त्री., **बदरास्थिजातं बीजम्**
( सुउ. ५०.२६ ) पहा 'कोलमज्जा'.

**कोलोदक**–न., **कोलसिद्धं जलम्** ( चशा. ८.३२ )
बोरे घालून उकळलेले पाणी.

**कोविका**–स्त्री, **मूषा०** ( र. १०.१ ) मूस.

**कोविदार**–पु., **वनस्पति०; गुणाः–कषायः संग्रहणो रोपणो दीपनः कफवातघ्नो गण्डमालागुदभ्रंशकुष्ठकेशरोगमूत्रकृच्छ्रनाशनश्च** ( ध. १.१९६ )
**वमनोपगगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१३ )
**सर्पविषे हृदयावरणार्थमुपयुज्यते**
( सुक. ५.१७–१८ )
**शाक०; फञ्जीचिल्ल्यादिगणे एकं द्रव्यम्**
( चसू. २७.१०० )
**पुष्पशाकगुणाः–मधुरं मधुरविपाकं रक्तपित्तहरं**
( सुसू. ४६.२८१ )
हिं.—पीला कचनार.
म.—**कोरळ, पिवळा कांचन.**
गु.—कांचनार.
बं.—पीतकांचन.
त.—मन्तारै.
कांचन तुरट, मळ घट्ट करणारा, व्रण भरून आणणारा, दीपक, कफवातनाशक, गंडमाला, गुदभ्रंश, कु[ष्ठ], केशरोग, लघ्वीला होणारा त्रास नष्ट करणारा, वा[मक] औषधाला उपकारक. सर्पविषाचा हृदयावर परिणा[म] होऊ नये म्हणून देतात. फंजीचिल्ल्यादी गणाती[ल] एक, फुलांची भाजी. गोड, पचनानंतरही गो[ड,] रक्तपित्तनाशक आहे.

**कोश**–पु., **ग्रन्थ्यावरणम्** ( चचि. १२.७९ )
गाठीवरचे आवरण.
**व्रणबन्ध०** ( सुसू १८.१७,१८ )
जखमेवर बांधावयाचा बंधप्रकार.
**सूक्ष्ममुखं बृहन्मध्यकुहरं खदिरतरुसारनिर्मि[तं] भाजनम्, अस्मिन्नञ्जनं स्थाप्यते**
( सुउ. १७ २१.२२ )
मोठ्या पोकळीचे पण लहान तोंडाचे खैराच्[या] आतील नाराचे केलेले भांडे. यात डोळ्या[त] घालावयाचे अंजन ठेवतात.
**अन्तःपूरणवस्तु** ( सुउ. २२.२० )
मध्ये भरावयाची वस्तु.
**चर्मकोशः** ( सुनि. १३.४७.४८ )
कातड्याचा कोश. पुरुष शिश्नाच्या मण्याच्या खा[ली] गाठीसारखा होणारा विकार.

**( कोशी )**–स्त्री., **सुगन्धिद्रव्य० नखे** ( ध. ३.५८ )
नखला.

**–कार**–पु., **वनस्पति० इक्षुभेदः. गुणाः–गुरुः शीतल[ः] रक्तपित्तक्षयापहः** ( सुसू. ४५.१५५ ) **द्र० 'इक्षु'**
एक ऊस. जड, थंड, रक्तपित्त व क्षयघ्न. पहा 'इक्षु'

**–धान्य**–न., **शमीधान्यानि माषादीनि**
( सुचि. ३२.११ )
उडीद इत्यादी धान्ये.

**–फला**–स्त्री., वनस्पति० कोशातकी ( ध. ३.१८९ )
दोडके.
त्रपुसम् ( रा ७.२४६ ) काकडी प्रकार.
देवदाली ( रा. ३.२४३ ) देवडांगरी.

**–बन्ध**–पु., व्रणबन्ध०, छिन्नशाखायामसौ प्रयोज्यः ( असंउ. ३१ )
व्रणाचा बंध. हातपाय तुटल्यावर हा बंध बांधावयाचा.

**–वती**–स्त्री., वनस्पति० कटुकोशातकी ( सुचि. १८.२०,२१ ) कडु दोडका.

**–स्थ**–पु., आनूपप्राणि०, गुणाः–मधुरः शीतस्निग्धः मधुरविपाकी बृंहणो बहुमलकारी वृष्यः बल्यः वातपित्तघ्नः श्लेष्मवर्धनः ( सुसू. ४६.१०८–११० ) शंख इत्यादी पाण्यात होणारे प्राणी. गोड, थंड, स्निग्ध, पचनानंतर गोड, पौष्टिक, शुक्रवर्धक, बलकारक, कफवर्धक, वातपित्तनाशक व मळ फार वाढविणारे.

**–स्थान**–न., धनसंचयस्थानम् ( असंसू. ८ )
पैसा, सोने, दागिने ठेवण्याचे स्थान, खजिना.

**कोशातक**–पु., वनस्पति० कोशातकी ( ध. १.१९२ )
दोडके. पहा 'कोशातकी'.

**( कोशातकी )**–स्त्री., वनस्पति०; गुणाः–तिक्ता कटुरुष्णा कुष्ठपाण्डुप्लीहाशोफगुल्मगरनाशनी; अप्रगाढा कोमला प्रशस्ता ( ध. १.१९२ ) सा चतुर्विधा बृहत्फलाऽल्पफला पीतपुष्पा श्वेतपुष्पेति भेदात् ( डसुसू. ११.११ ) तस्याः स्वरसः उभयतोभागहरः ( सुसू. ३९.५ ) लघुः रक्तपित्तहरा ज्वरश्वासकासारुचिघ्नी ( सुसू. ४६.२६२–२६३ ) व्रणशोधनद्रव्ये उपयुज्यते ( सुसू. ३७.१७.–१९ ) क्षारनिष्कासनार्थमुपयुज्यते ( सुसू. ११.११ ) वमनोपगद्रव्येष्वेका ( असंसू. १४.५ )
हिं.—कडवी तोरई.
म.—**कडू दोडका.**
गु.—कडवी विसोडी.
बं.—झिंगा.
त.—पैप्पीर्क्कम्.
कडु दोडके–कडु, उष्ण, कुष्ठ, पाण्डु, प्लीहा, सूज, गुल्म, कृत्रिमविषनाशक. हे कोवळे चांगले.
**प्रकार** ४–१ मोठे फळ २ लहान फळ ३ पिवळ्या फुलांचे ४ पांढऱ्या फुलाचे. दोडकीचा रस वांती व रेच असा दोन्ही मार्गाने दोष काढणारा आहे. वांतीच्या इतर द्रव्याच्या जोडीला देण्यासारखे. सुश्रुतमताने हिचा क्षारही काढतात. तसेच हलकी रक्तपित्तनाशक, ज्वर, श्वास, खोकला, अरुचिनाशक, व व्रणाच्या शुद्धीकरता उपयोगी.
देवदाली ( सुचि. १०.८ ) देवडांगरी.

**कोशाम्र**–पु., वनस्पति०, क्षुद्राम्रः; गुणाः–अम्लः कटुरुष्णो गुर्वातघ्नः कफपित्तकरो रुच्यः कुष्ठघ्नो रक्तशोधनो विदाही शोफकारी ( ध. ५.९ ) स्नेहविरेचनद्रव्यम् ( सुचि. ३१.५ ) अस्य स्नेहस्तिक्तः कटुः कषायोऽधोभागदोषहरः कृमिकफकुष्ठानिलहरः दुष्टव्रणशोधनश्च ( सुसू. ४५.१२४ ) अम्लो मधुरः सरो बल्यः पथ्यो रोचनः पाचनो विषव्रणहरश्च ( ध. ६.१३४ ) अस्य मज्जा मधुरा स्निग्धा पित्तानिलापहा अग्निबलकृच्च ( सुसू ४६.२०७ )
हिं.—कोशंभ, छोटा आम, कोशाम.
म.—**लाल रानआंबा.** कोशांबा, कोशिंब.
गु.—कोशम.
बं.—केओडा, केवडाफल.
त.—काट्टुमामर.
जंगली आंबा, आंबट, तिखट, उष्ण, जड, वातघ्न, कफपित्तकारक, चवीला चांगला, घशाशी आंबट आणणारा, रक्तशोधक, कुष्ठनाशक, सूज करणारा, पाचक, विषव्रणनाशक. **याचे तेल**–कडु, तिखट, तुरट, रेचक, कृमि, कफ, कुष्ठ, वातनाशक, वाईट व्रणाला शुद्ध करणारे, स्निग्ध, रेचक.
**कोय**–गोड, स्निग्ध, पित्तवातनाशक, अग्निबल वाढविणारी.

**कोषकार**–पु., कीट०, कौशेयतन्तुनिर्माता ( चशा. १.९६ )
तंतु निर्माण करून कोश करणारा एक किडा.

**कोषवती**–स्त्री., वनस्पति० कोशातकी (सुउ. ५६.१७)
दोडकी.

**कोष्ठ**–पु., शारीर० ( चसू. २८.३१ ) सर्वमुदरम ( सुउ. ४२.८० ) आम–अग्निपक्व–मूत्र–रुधिर–उण्डुक–फुफ्फुसेत्यादीनां स्थानम् ( सुचि. २.१२ ) महास्रोतः, आभ्यन्तरो रोगमार्गः ( चसू. ११ ४८.) आमपक्वाशयाश्रयः ( अहसू. १२.४६ महास्रोतसि विभागविशेषः ( सुशा. ४.१६ 'कोष्ठशब्देनात्र आहारपाकाधारो रसमूत्रपुरीष धारो ग्रहण्यभिधानः' गयी ( सुनि. ७.६,७ स क्रूरमृदुसममध्यादिभेदाच्चतुर्विधः (अहसू. १.९

तत्र क्रूरो बहुवातश्लेष्मा दुर्विरेच्यस्तत्र तीक्ष्णगुणोपेता मात्रोपयोज्या ( सुचि. ३३.२१ ) **मृदुर्बहुपित्तयुक्तः, स क्षीरेणापि विरिच्यते, तत्र मृद्वी मात्रैव योज्या** ( सुचि. ३३.२१ ) मध्यः **समदोषयुक्तः स एव साधारण इत्युच्यते, तत्र विरेचनार्थं मध्यमा मात्रा** ( सुचि. ३३.२१ )

शरिराचा एक मोठा भाग. कोठा. सर्व उदर ( खालचा कोठा ) आम अग्निपक्व—मूत्र, रक्त, यांचे आशय उण्डुक, फुप्फुस इत्यादींचे स्थान. महास्रोतस आतला रोगमार्ग. आमाशय ते पक्वाशयासुद्धा अवयवांचा आश्रय, महास्रोतसाचा एक विशिष्ट विभाग. कोष्ठशब्दाने आहाराच्या पाकाचा आधार रस मूत्र मळ यांचा आधार ग्रहणी सांगावयाची आहे. कोठा कठीण मऊ मध्यम व सम असा चार प्रकारचा १ **कठीण**—पुष्कळ वातकफयुक्त व रेचक न लागू होणारा, म्हणून तीव्र रेचकाचे अधिक प्रमाण द्यावे लागते. २ **मऊ**—पुष्कळ पित्ताने युक्त. तो दुधाने सुद्धा रेच करतो. म्हणून त्याला सौम्य रेचक किंवा सारकाची कमी मात्रा द्यावी लागते. ३ **मध्यम**—कफाधिक्य-यात रेचकरची मध्यम मात्रा उपयुक्त. व्यवस्थित रेच होत नाहीत. ४ **सम**—तिन्ही दोष सम. यात योग्य मात्रेने अगदी साफ रेच होतात. याला मध्यम कोष्ठही म्हणतात.

**( कोष्ठी )**—स्त्री. यन्त्र० **धातूनां सत्त्वस्य पातनार्थं शुद्ध्यर्थं वा भूमौ खनित्वा निर्मितमग्निगृहम्** ( र. २.१६९ ) **तत्षोडशाङ्गुलविस्तीर्णं हस्तैकमात्रमायतं समं च** ( र. ९.४६ )

एक यंत्र. धातूची शुद्धि व सत्वपातन याकरिता जमिनीमध्ये खणून विटा माती यांनी तयार केलेली भट्टी. एक हात उंच व सोळा अंगुळे गाभ्याची.

**मृण्मयकोशः** ( र. १०.३९ )

मातीचा रांजण. कोठी.

**—भेद**—पु., रोग० **लक्षणानि ज्वरो दाहो मूत्रमार्गान्मुखाद्गुदाच्च रक्तप्रवृत्तिर्मूर्च्छा श्वासस्तृडाध्मानमभक्तच्छन्दो विण्मूत्रवातसङ्गस्वेदास्रावोऽक्षिरक्तता लोहगन्धि मुखं गात्रदौर्गन्ध्यं हृच्छूलः पार्श्वशूलश्च; यदा कोष्ठो भिन्नो रक्तेन पूर्यते तदेमानि लक्षणानि भवन्ति** । ( सुचि. २.१३–१५) **तत्र विण्मूत्रवातानां स्वैः स्वैर्मार्गैर्गमनं ज्वराध्मानाद्युपद्रवराहित्यं च साध्यलक्षणम्** ( सुचि. २.५५ ) **आमाशयस्थे रुधिरे रुधिरं छर्दयति, अतिमात्रेणाध्मानेन शूलेन च विनश्यति। पक्वाशयस्थे रुधिरे शूलो गौरवं च भवेत् । नाभेरधस्ताच्छीतत्वं खेभ्यश्च रक्तागमो भवति। अभिन्नोऽप्याशयः सूक्ष्मैः स्रोतोभिः स्यन्दमानेन रक्तेन पार्श्वेऽभिपूर्यते । तत्रान्तर्लोहितं शीतपादोच्छ्वासकराननं रक्ताक्षं पाण्डुवदनमानद्धत्वं च तं विवर्जयेत्** । ( असंउ. ३१.२९९ ) **क्लिष्टछिन्नान्त्रभेदेन भिन्नकोष्ठो द्विविधस्तत्र प्रथमे लक्षणान्यल्पानि, द्वितीये तीव्रत्वादतिबाधकानि; तत्रापि प्रथमः संशयितायुर्द्वितीयस्तु नैव जीवति** ( असंउ. ३१ ) **अयं शस्त्रसाध्यः** ( असंउ. ३१.२९९ )

कोठा फुटणे. कोठ्यातला अवयव फुटणे. **लक्षणे**—कोठा रक्ताने भरतो. ताप, आग, मूत्रमार्ग, गुद व तोंड यातून रक्तस्राव मळमूत्र, वात कोंडणे, पोट फुगणे, तहान अन्नावर इच्छा नसणे, तोंडाला लोखंडाचा वास, घाम न येणे, हृदयात शूळ, बरगडीत शूळ; दमा, मूर्च्छा, डोळे लाल, शरिराला घाण ही होतात. **साध्य लक्षणे**—मळ, मूत्र, वात ही आपापल्या मार्गाने बाहेर जाणे व ताप, पोट फुगणे इत्यादी उपद्रव न होणे. आमाशयात फुटला तर रक्ताची ओकारी, वरचे पोट फार फुगते व शूळ फार होतो आणि मरतो. पक्वाशयात फुटला तर रक्ताचा गुदमार्गाने स्राव, शूळ व जडत्व, व बेंबीच्या खालच्या भागात थंडपणा. आशय न फुटताही सूक्ष्मवाहिन्या फुटल्याने पाझरलेल्या रक्ताने आशयाच्या बाजूचा भाग रक्ताने भरतो. **असाध्य लक्षणे**—असा कोठ्यांत रक्तस्राव झालेला रोगी लाल डोळ्याचा, पांढरा फटफटीत तोंडाचा, थंड हात पाय, श्वासाचा व पोट फुगलेला असेल तर त्याची चिकित्सा करू नये. कोठा फुटण्याचे दोन प्रकार—एक क्लिष्ट व दुसरा आंतडे फुटलेला. पहिल्यात चिन्हे थोडी, व सौम्य दुसऱ्यात तीव्र व अतिशय बाधक. पहिल्यात रोगी जगण्याचा संभव. दुसऱ्यात रोगी शस्त्रक्रियेशिवाय जगणार नाही.

**—रुजा**—स्त्री., लक्षण० **कोष्ठशूलः** ( अहसू. १६.११ )

कोठ्यात शूळ, पीडा.

**—वात**—पु., लक्षण०; **कोष्ठे प्रभूतो वातः** ( चचि. १३.३८ )

कोठ्यात वाताचा फार संचय.

**—विदाह**—पु., लक्षण० **कोष्ठे दाहत्पीडा** ( सुसू. ४२.१०२ ) कोठ्यात आग,

**-विरुद्ध** न., कोष्ठायाहितम् ( चसू. २६.९५ )
कोठ्याला अहितकारक.

**-शूल**-पु., लक्षण॰, उदरशूलः ( चचि. १३.३८ )
कोठ्यात शूळ. पोटात शूळ.

**-संक्षोभ**-पु., लक्षण॰ आमाशयपक्वाशयादिस्थानानां चलनम् ( सुनि. ८.३ )
अमाशय पक्वाशय इत्यादी स्थानात नेहमीपेक्षा अधिक गति निर्माण होणे.

**कोष्ठागारिका**-स्त्री., कीट॰ ( सुशा. १०.५७ )
द्र॰ 'कोष्ठागारिन्'
पहा किडा 'कोष्ठागारिन्'.

**कोष्ठागारिन्**-पु., सविषकीट॰ अयं प्राणनाशनः; तेन दष्टस्य सर्पवद्वेगज्ञानं तीव्रा वेदना सांनिपातिकाः विकाराश्च भवन्ति, दंशस्तु वर्णेन रक्तपीतासितारुणः क्षाराग्निदग्धवच्च भवति ( सुक. ८.१५-१८ )
एक विषारी किडा. हा प्राणनाशक. दंश रंगाने तांबडा, पिवळा; पांढरा, तांबडट क्षार किंवा अग्नीने जळाल्यासारखा असतो. सर्पदंशाप्रमाणे वेग तीव्र वेदना व त्रिदोषी विकार.

**कोष्ठाङ्ग**-न., नाभिहृदयादिपञ्चदशविधाङ्गम्, तानि च नाभिर्हृदयं क्लोम यकृत् प्लीहा वृक्कौ बस्तिः पुरीषाधानमामाशयः पक्वाशयः उत्तरगुदमधरगुदं क्षुद्रान्त्रं स्थूलान्त्रं वपावहनं च ( चशा. ७.१० )
कोठ्याची अंगे-अवयव. १५ आहेत. नाभि ( बेंबीच्या प्रदेशातला लहान आतड्याचा सर्व भाग ) हृदय, क्लोम, यकृत्, प्लीहा, वृक्क, बस्ति, मलाशय, आमाशय, पक्वाशय, उत्तर ( वरचे ) गुद, खालचे गुद, क्षुद्रांत्र ( अगदी लहान आंतडे ) मोठे आंतडे व वपावहन.

**कोष्ठानाह**-पु., लक्षण॰ ( चसू. १४.२१ )
कोठा फुगणे.

**कोष्ठाभिसरण**-न., कोष्ठे गमनम् ( चवि. ७.१६ )
क्षीरगुडादिलोभेन कोष्ठमहास्रोतःपरिसरे समन्ताद् ( कृमीणां ) आगमनम्, इतस्ततः चलनं वा
दूध, गूळ, इत्यादींच्या लोभाने आंत्राच्या पोकळीच्या मध्यात कृमींनी येणे.

**कोष्ठिका**-स्त्री., कोष्ठी ( र. १०.३३ ) कोठी.

**कोहकारक**-पु., मृग॰ ( असंसू. ७.३३ ) एक हरीण.

**कोहल**-पु., यवसक्तुकृतं मद्यम्, गुणाः-त्रिदोषो भेद्यो वृष्यो वदनप्रियश्च ( सुसू. ४५.१८० )
जवाच्या सातूपासून तयार केलेले मद्य.
**गुण**-रुचकर, शुक्रवर्धक, मळ फोडणारे पण त्रिदोषवर्धक आहे.

**कौक्कुट**-वि., कुक्कुटपक्षिसंबन्धि ( चसू. १३.८३ )
कोंबड्याचे, कोंबड्यासंबंधी.

**-पुट**-न., कुक्कुटपुटम्, भूमितले वितस्तिद्वयोच्छ्रिते तावदेव विस्तृते खाते पूरितैश्छगणैः घटसंपुटितद्रव्यस्य परिपचनम् ( र. २.१३५ )
जमिनीत दोन वीती प्रमाणाचा लांब रुंद व खोल खड्डा करून त्यात शेण्या भरून त्यात योग्य विधीने औषध ठेवून पक्व करणे.

**कौशी**-स्त्री., बालग्रह॰ पूतनाग्रहः ( काचि. बालग्रह पृ. १०१ )
पूतना नांवाचा बालग्रह.

**कौट**-पु., वनस्पति॰ कुटजः ( ध. २.१३ ) कुडा.

**-ज**-पु., वनस्पति॰ कुटजः ( ध. २.१३ ) कुडा.

**-जफाणित**-न., कुटजफाणितम्, क्वाथप्रकाराणामेकतमोऽयम् ( सुउ. ४०.८९-९० )
कुड्याचा एक प्रकारचा काढा ( लेह )

**-जयव**-पु., वनस्पति॰ इन्द्रयवः ( सुउ. ४०.४० )
इंद्रजव.

**कौटिल्य**-न., वनस्पति॰ चाणक्यमूलम् चाणाख्यमूलम् ( रा. ७.५३ )
एक चविष्ट पाचक मोठा कंद.

**-दयित**-पु., योग॰ विषहर॰ ( असंउ. ४० )
एक विषहर योग.

**कौडविक**-न., मान॰, कुडवपरिमितः ( असंचि. ५ )
कुडव प्रमाणाचा.

**कौण्डिन्य**-पु., ऋषि॰ ( चसू. १.१० ) एक ऋषि.

**कौण्डिन्यक**-पु., कीट॰; शकृन्मूत्रविषः ( सुक. ३.५ ) आग्नेयकीट॰; ( असंउ. ४३ ) अयं पित्तजविकारान् करोति ( सुक. ८.८-१२ ) द्र॰ 'कीट'
एक विषारी किडा. याचे मलमूत्र विषारी. पित्तज विकार करतो.

**कौण्य**-न., लक्षण॰ कुणेर्भावः, करवैकल्यम्, नष्टकरत्वम् ( सुनि. ५.१८ )
हात विकल होणे, हात निकामी होणे.

**कौतुकमङ्गल**-न., विशिष्टकाल एव यो रक्षाबन्धो बाह्वादौ बध्यते तत् कौतुकम्, तद् एव मङ्गलत्वात्कौतुकमङ्गलम् ( असंशा. ३.१८ )
विशिष्ट अशा वेळी हाताला राखी बांधणे; याला कौतुक म्हणतात, ते मंगल आहे म्हणून ते कौतुक मंगल होय.

**कौत्स**–पु., ऋषि० ; **द्वित्रिवेगं वमनं कनीयः, चतुष्पञ्चवेगं मध्यमं षट्सप्तवेगमुत्तममित्यस्य वमनविषये मतम्** ( कासिद्धि. ३ पृ. १५२ )
एक ऋषि. वांतीच्या बाबतीत वांतीच्या औषधाने सहा सात वेळा वांती होणे उत्तम, ४–५ वेळा होणे मध्यम व दोनतीन वेळा होणे कनिष्ठ, असे मत असलेला.

**कौन्ती**–स्त्री., वनस्पति० **रेणुका** ( ध. ३.५१ )
तोंड स्वच्छ करणारी, खाज इ० नाहीसे करणारी, अतिथंड वनस्पती.

**कौन्तेय**–पु., **अर्जुनः** ( रा. ९.१९२ ) अर्जुनसादडा.

**कौप**–न., **कूपसंबन्धि, कूपोदकम्** ( सुसू. ४५.८ )
आडाचे. आडासंबंधी, आडाचे पाणी.

**कौपीन**–न., **कटिवस्त्रम्** ( चशा. ५.१२ )
कंबरेचे नेसण्याचे वस्त्र, लंगोटी.

**कौबेर**–न., **चित्तप्रकृति० ; शुद्धसत्त्वस्य प्रकारः** ( चशा. ४.३७ ( ६ )
**मध्यस्थत्वं सहिष्णुत्वमर्थप्राप्तिसंचयपरत्वं महाप्रसवशक्तित्वं चास्य लक्षणम्** ( सुशा. ४.८४ )
कुबेरासारखी मनाची ठेवण–प्रकृति. शुद्ध मनाचा प्रकार. याचे लक्षण–सहनशील एका टोकाला मताने न जाणारा नेहमी मधला मार्ग काढणारा; धन कमावणारा व संचय करणारा. मोठमोठाले व्यवसाय सुरू करून संपत्ति निर्माण करणारा.
**वनस्पति० कुष्ठम्** ( ध. ३.४९ )
एक प्रकारचे कुष्ट, कोष्ट कोलिंजन.

**कौब्ज्य**–न., **कुब्जत्वम्** ( सुशा. १०.४६ ) कुबडेपणा.

**कौमार**–वि., **कुमारसंबन्धि** ( का. धात्रीचि. पृ. १४५ )
बालकासंबंधी.

–**धूप**–पु., **योग० धूपकल्पः** ( काकधूपकल्प पृ. १७० )
धूपाचा एक योग.

–**भृत्य**–न., **आयुर्वेदस्याऽष्टाङ्गेष्वेकम्, कुमारभरणधात्रीक्षीरदोषसंशोधनार्थं दुष्टस्तन्यग्रहसमुत्थानां च व्याधीनामुपशमनार्थं तन्त्रम्** ( सुसू. १.५ ) **आयुर्वेदस्याष्टतन्त्राणामादिमं तन्त्रम् । वृद्धजीवकेन निर्मितं तन्त्रम्** ( काक. २७ ) **तद् वात्स्येन प्रतिसंस्कृतम्** ( काक. )
आयुर्वेदाच्या आठ अंगांपैकी एक अंग. ज्यांत बालकाचे पोषण, अंगावरच्या दुधाची शुद्धि, अशुद्ध दुधामुळे तसेच बालग्रह, दात येणे इ० मुळे होणाऱ्या रोगांचे ज्ञान व त्यांचे उपाय सांगितले आहेत ते. वृद्धजीवकाने केले व वात्स्यायनाने ते शुद्ध केलेले, वाढविलेले शास्त्राचे अंग.

**कौमारी**–स्त्री., **वाराहीकन्दः** ( रा. ७.१३४ )
डुक्करकंद. एक वनस्पती.

**कौम्भघृत**–न., घृत० **पुराणघृतभेदः** ( काखिविसर्पचि. ) **सर्पिर्दशाब्दिकं नाम दशवर्षपुराणं सर्पिः** ( चसू. २४.५७ ) **शतवर्षस्थितम्** ( सुउ. १२.४ )
जुन्या तुपाचा प्रकार. १० वर्षांचे जुने तूप. शंभरनर्षांचे जुने तूप.

**कौरव**–न., पु., **कार्पासम्** ( चसू. १४.४९ ) कापूस.

**कौर्पर**–पु., संधि० **बाहुमध्यगतः सन्धिः** (चसू. ३.३२)
हाताच्या मधला सांधा. कोपर.

**कौलक**–न., **वनस्पति०** ( काखेकि ) **पटोलभेदः** ( चसू. २७.९७ ) पडवळाचा प्रकार.

**कौलत्थ**–पु., **यूष०** ( सुक. ५.१८, १९ )
कुळथाचे. कुळीथ उकळलेले कढण.

**कौलाली**–स्त्री., **मूषायोग्या मृत्तिका** ( र. १० ६.७ ); **कुलालः कुम्भकारः कुलालस्येयमिति कौलाली मृत्तिका, कुलालकर्मोचितत्वादियं मृत्तिका मूषाक्षमाऽपि ज्ञेया**
कुंभाराची माती. मूस करण्यास योग्य माती.

**कौशल्य**–पु., **कोशलदेशः** ( काखिल. २५.९ )
प्राचीन अयोध्या राजधानीचा प्रांत.

**कौशिक**–पु., ऋषि० **यज्ञःपुरुषविषये विवदमानेष्वेकः** ( चसि. ११.४ )
पुरुष व रोग कसे उत्पन्न होतात यासंबंधी केलेल्या वादविवादात भाग घेतलेल्यातील एक ऋषी.
**प्राणि० उलूकः** ( सुसू. २९.३६, ३७ ) घुबड.
**वनस्पति० जरणद्रुमः** ( रापरि. ९.१३ )
लांब पानाचा कडु, तिखट, रक्तपित्त व रक्तज विकारनाशक एक वनस्पती.
**गुग्गुलुः** ( ध. ३.१२७ ) गुग्गुळ.

**कौशिकी**–स्त्री., **नदीसंज्ञा** ( सुचि. ३०.३४ )
बिहारप्रांतातील दरभंग्याच्या पूर्वेस असणारी नदी.

**कौशेय**–न.; **वस्त्रप्रकारः कोशाकारकिमिलालातन्तुरचितः पट्टः** ( सुउ. ३९.२७५ )
वस्त्राचा प्रकार. कीटकांनी निर्माण केलेल्या तंतूच्या कोशाचे पुन्हां तंतू काढून त्यांपासून केलेले वस्त्र.
**राङ्कवादिवस्त्रम्** ( अरु. अहृसू. १७.५ )
**पट्टसंज्ञं वसनम्** ( अरु. ) ( अहृसू. ३.१३ )
पट्ट नाव असलेले कापड.

**तसरसंज्ञं वस्त्रम्** ( सुचि. ४.२५ )
तसर नावाचे कापड.

**कौषेय**–न., **कौशेयम्** ( चसू. ६.१५ ) कोशाचे.

**कौष्ठिक**–वि., ( **कुष्ठव्याधिप्रकरणम्** ) (चचि. १५.१२८)
कुष्ठाचे, कुष्ठासंबंधी, कुष्ठात होणारे.

**–नवक**–न., योग० ( इंदु. असंउ. ३७ )
( त. प्र. पृ. ३१२ ) एक औषधियोग.

**कौसुम्भ**–न., शाक० **कौसुम्भशाकम्** ( चसू. २७.११० )
करडईची भाजी.

**( कौसुम्भी )**–स्त्री., **व्रीहि**० ( रा. १६.११७ )
तांदुळाचा एक प्रकार.

**–शाक**–न., **वनस्पति**०, **गुणाः–मधुरं कटूष्णं दृष्टि-प्रसादरुचिदीप्तिकरं विण्मूत्रदोषापहरं मदघ्नं च** ( रापरि ७.८१ )

**रूक्षं श्लेष्महरं लघु** ( सुसू. ४६.२७२ ) **अम्लं गुरु पित्तकृत् सरं च** ( अहृसू. ६.१०१ )

हिं.—कुसुम्बर, कुसुम.
म.—**करडई**, कर्डी;
गु.—कुसुंबी, कसंबी, कब्री;
बं.—कजिरेह;
त.—सेन्दुरकम्, सेन्दुरूक्काई, कुसुम्बविराई;
फा.—खसकदान;

करडई भाजी. गोड, तिखट, उष्ण, अग्निदीपक, रुचिकर, विष्ठामूत्र यातील दोषनाशक, मदनाशक व दृष्टि स्वच्छ करणारी. रूक्ष कफहर व लघु. सुश्रुतमते—आंबट, जड, पित्तकर व सारक.

**खनिज० पुष्पाञ्जनम्** ( ध. ३.१६२ )
डोळ्यात घालावयाचे एक प्रकारचे अंजन, सुरमा.

**कुसुम्भम्** ( रा. १६.१८९ )
करडईचे धान्य.

**कौसेन्दुक**–पु., **धान्य० व्रीहि**० ( रा. १६.९७ )
एक प्रकारचे तांदूळ.

**कौस्तुभ**–पु., **रत्न० कुं पृथ्वीं स्तुभ्नाति व्याप्नोति इति कुस्तुभः समुद्रः तत्र भवः कौस्तुभः** ( असंशा. १२.८ )
एक रत्न. विष्णूच्या गळ्यातील एक रत्न.

**कौहली**–स्त्री., **सुराभेदः** ( असंसू. ६.२७ ) द्र० '**सुरा**'
दारूचा प्रकार.

**क्रकच**–पु., **शस्त्र० करपत्रम्**, ( इन्दुः असंनि. ५.४२ )
करवत.

**संनिपातज्वर० वातमध्यपित्ताभिवृद्धकफहीनैरसौ भवति । तल्लक्षणम्–स्तब्धाङ्गः स्तब्धदृष्टिर्हत इव शेते, बह्वनश्नतः पुरीषं चातिमात्रं विरिच्यते । सर्वेषां स्रोतसां पाकश्च** ( का. विशेषकल्पाध्यायः )
एक दोषी ताप–ज्वर–पित्ताधिक वातमध्य कफहीन ज्वर. **लक्षण**–अंग जखडलेले, दृष्टि थिजलेली, रोगी प्रेतासारखा पडलेला असतो. खाण्याच्या मानाने मळाचे रेच अतिशय होतात. सर्व स्रोतसमार्ग पिकतात, पचतात.

**( क्रकचा )**–स्त्री., **वनस्पति० केतकी** ( रापरि. १०.२ )
केवडी.

**–च्छद**–पु., **वनस्पति० केतकी** ( धपरि. ५.१ )
केवडी.

**–पत्र**–पु., **वनस्पति० शाकः** ( रा. ९.६ ) साग.

**क्रकर**–पु., **पक्षि**० ( चसू. २७.४९ ) **तद्गुणाः–लघुर्हृद्यो मेधाग्निबलवर्धनो वृष्यो वातपित्तहरश्च** ( सुसू. ४६.६३–६४ )

हिं.—करेदु कुवार.
बं.—करकटीया.
म.—**करढोक**.

**गुण**–हलका, हृदयाला हितकर, बुद्धि अग्नि बलवर्धक आणि वातपित्तनाशक.

**क्रथ**–पु., **लक्षण० अकस्मादुच्छ्वासावरोधः** ( सुचि. ४०.१६ ) एकदम उच्छ्वास रोकला जाणे.

**क्रथन**–न., **लक्षण० स्वपतः कण्ठे घुर्घुरारवः अकस्मा-च्छ्वासाऽवरोधः** ( सुसू. १५.३२ )
एकदम उच्छ्वास रोकला जाणे.

पु., **अकस्मादुच्छ्वासावरोधः क्रथनं एतत्क्रियावांश्च क्रथन इत्युच्यते** ( चशा. ८.२१ )
एकदम उच्छ्वासाचा अवरोध म्हणजे क्रथन. ही क्रिया करणाराही क्रथन.

**क्रन्दनम्** ( चसि. २.२२ ) **नासाशब्दः** ( इन्दुः असंनि. ४.१३ )
नाकातला शब्द, रडणे, ओरडणे.

**क्रम**–पु., **उपक्रम०, चिकित्सा** ( सुचि. २२.५२ )
अवस्थानुरूप उपचार.

**अनुक्रमः** ( चसि. १.३ ) एकामागून एक क्रम.

**विधिः** ( अहृसू. १६.२८ )
कशानंतर काय करावयाचे ते.

**परिपाट्या यथोचितसंनिवेशः ( न्याय. )**
रूढीप्रमाणे क्रमाने योग्य ते योग्य ठिकाणी योजणे.

**उद्दिष्टानामर्थवशाद्यथावद् ग्रहणम्** ( न्याय. )
उद्दिष्टांचे अर्थानुरूप वास्तवतेने घेणे. काय हवे ते अर्थ जाणून घेणे.

**परिपाटी** ( चवि. ८.३ ) रुढी, परंपरा. अनुक्रम.

**–कोविद्**–वि., **पेयादिक्रमाभिज्ञः** ( चसि. १२.६. )
पेया, विलेपी इत्यादि केव्हा किती कशी द्यावयाची हे जाणणारा.

**–पूरक**–पु., **वनस्पति० वसुकः** ( रा. १०.३३ )
बुक, बक इत्यादि. ( एरंड एक मत ).

**–विरुद्ध**–वि., **क्रमं त्यक्त्वा यन्निषेव्यते तत्, यथा विण्मूत्रमनुत्सृज्य भुज्यमानं क्रमविरुद्धं भवति** ( चसू. २६.९७ )
क्रम सोडून खाद्यपेय द्रव्यांचे सेवन करणे. जसे– मलमूत्रांचे विसर्जन न करतांच खानपान करणे.

**–सेवन**–न., **परिव० अन्नपानादीनां विधियुक्तं सेवनम्** ( चवि. ५.२२ )
अन्नपान झोप व्यायाम इत्यादींचे शास्त्राने सांगितलेल्या क्रमाने व प्रमाणाने सेवन करणे.

**क्रमुक**–पु., **वनस्पति० पूगफलम्** ( रा. ११.७१ ) ( सुसू. ३८.२९ ) सुपारी.
न.,–**वनस्पति० तूलम्** ( ध. ५.६४ ) कापूस.
**वृक्षरोध्रः** ( सुसू. ड. ३८.८ ) एक रोध्र.
**पट्टिकालोध्रः** ( चक्र. चचि. ४.७४–७६ ). ( असंउ. ६ ) रोध्राचा प्रकार.
**लोध्रभेदः** ( ध. इ. १७७ ) रोध्राचा प्रकार.
**ह्रस्वपूगफलम्** ( चक्र. चचि. ७.८१ )
लहान सुपारी.

**–प्रसून**–पु., **वनस्पति० धूलीकदम्बः** ( रा. ९.१७३ )
कळंब.

**क्रमोत्पत्ति**–स्त्री., **क्रमश उत्पत्तिः** ( चचि. १५.२४५ )
क्रमाक्रमाने होणारी उत्पत्ति.

**क्रमोपयोग**–पु., **क्रमेणोपयोगः, क्रमेण योगः, क्रमः चिकित्सा उपयोगो योजना चिकित्साकरणमित्यर्थः** ( सुउ. ६१.१८ )
क्रमाने केलेला उपयोग. क्रमाने केलेली योजना, क्रम म्हणजे उपचार. उपयोग म्हणजे योजना. उपचाराची योजना, उपचार करणे.
**सुष्ठुपद्धत्या उपयोगः** ( चवि. ३.३६ )
चांगल्या पद्धतीने केलेला उपयोग.

**क्रय**–पु., **पण्यम्** ( चसू. १५.३ ) बाजार.

**क्रव्य**–न., **मांसम्** ( सुउ. १७.३५ ) मांस.

**–भुज्**–वि., **गृध्रादिः** ( सुउ. १७.३५ )
मांस खाणारा. मांसाहारी गिधाड इत्यादी.

**क्रव्याद्**–वि., **मांसादप्राणी व्याघ्रादिः** ( असंचि. ७ )
मांस खाणारा प्राणी, वाघ सिंह इत्यादी.

**क्रव्याद**–वि., **मांसादो व्याघ्रादिः, तन्मांसरसो ग्रहण्यां शस्तः** ( चचि. १५.११६ ) **क्रव्यादमज्जा लघुशीतकषायो रक्तपित्तघ्नश्च** ( सुसू. ४५.१३१ )
मांसाहारी. वाघ इत्यादी प्राण्यांचा मांसरस ग्रहणीमध्ये उपयुक्त. या प्राण्यांची मज्जा हलकी, थंड, तुरट, रक्तपित्तनाशक.

( **क्रव्यादी** ) स्त्री., **वनस्पति० जटामांसी** ( ध. ३.४५ )
जटामांसी.

**क्रव्यान्मांसरसाभ्यास**–पु., **मांसादमांसरसस्य सततं नियमेन सेवनम्, अयं ग्रहणीदोषशोषार्शोघ्नानां च श्रेष्ठः** ( चसू. २५.४० )
मांस खाणाऱ्या प्राण्यांच्या मांसाचा रस सतत नियमाने सेवन करणे. हे ग्रहणी, क्षय, मूळव्याध, विकार नाहीसा करणाऱ्या आहार्य द्रव्यात श्रेष्ठ आहे.

**क्रव्यादप्रसह**–वि., **वानरमूषककुलिङ्गमधुहाव्यतिरिक्ता द्वीप्यादयो, मांसाहारत्वात्** ( अहृसू. ६.६२–६३ हे )
वानर उंदीर इत्यादी प्राण्यांव्यतिरिक्त वाघ सिंह इत्यादी प्राणी. मांसाहारी.

**क्रव्यादरस**–पु., **योग० गुरुमांसगुरुभोज्यपाचनोऽत्यग्निदीपनश्च** ( र. १६.१४०–४७ )
जड मांस इतर जड आहार पचन करणारा व अग्नि अति प्रदीप्त करणारा औषधियोग.

**क्रशिमन्**–पु., **कार्श्यम् कृशता, कृशस्य भावः** ( अहृसू. १४.३३ )
किडकिडीतपणा, हाडकुळे शरीर असणे.

**क्राथिन्**–वि., **हिंसाशीलः** ( ड. सुशा. ४.६४ )
हिंसक, हिंसा करण्याचा स्वभाव असलेला.
**क्रथनशीलः सुप्तः सन् नासाद्वारेण शब्दं करोति,** ( इन्दु. असंशा. ८.१४ )
झोपेत नाकाने आवाज करणारा. घोरणारा.

**क्रान्त**–न., **पारदसंस्कार० क्रामणम्, रसस्य शरीरान्तःस्थसर्वधातुषु व्याप्तिरेकीभावो वा** ( र. २७.२०–२३ )
पाऱ्यावरचा क्रामण नांवाचा एक संस्कार. शरिरात देण्यास योग्य झालेला संस्कारी पारा देऊन त्याची सर्वधातूंमध्ये व्याप्ति होणे, त्यात एकरूप होणे.

**( क्रान्ता )**–स्त्री., वनस्पति० बृहती ( रा. ४.१२० )
रिंगणी, डोरली.

**क्रामण**–न., पारदसंस्कार० वेधद्वारा तारादीनां स्वर्णादिविधायकम्। पारदस्य लेपावापाद्युपयुक्तस्य लोहधात्वन्तःप्रवेशाभिव्याप्तिकारकम् ( र. ३.७३ )
पाऱ्यावरचा एक संस्कार. रुपे इत्यादी धातूंमध्ये वेध करून त्यांचे सुवर्णादिकांमध्ये रुपांतर करणारा संस्कार. लेप इत्यादींनी पाऱ्याचा लोखंड तांबे इत्यादी धातूंमध्ये आत प्रवेश करविणारा व त्याला सर्वत्र मिसळविणारा संस्कार.

**क्रिमि**–पु., कीट० ( चसू. १.१०१ )
कोष्ठपुरीषादिबाष्पसम्भवो जीवः(ड. सुसू. १.३०)
ध्वजभङ्गरोगे लिङ्गे जातो जन्तुविशेषः
( चचि. ३०.१७४–७५ )
किडा. कोठ्यातील मळादिकांच्या ऊष्म्याने उत्पन्न झालेला जीव.
शिश्न पिकल्यावर व झडल्यावर त्यात होणारा जीव.
रोग० क्रृमिजन्यो व्याधिरयं तन्नाम्नैव ज्ञायते। क्रृमयो बाह्याभ्यन्तरभेदतो द्विविधाः। तथा बहिर्मल-कफासृग्विड्जन्मभेदाच्चतुर्विधाः। नामतश्च विंशतिविधाः। तदुत्पत्तिः–आमपक्वाशये कफजानां पुरीषजानां तथा धमन्यां च रक्तजानां क्रृमीणां सम्भवः। तत्सम्प्राप्तिः–अजीर्णादिभिः प्रकुपिताः श्लेष्मादिदोषाः पुरीषादीन्यधिष्ठाय क्रृमीन् जनयन्ति ( चवि. ७.९–१३ )
सञ्जातक्रृमिलक्षणम्–ज्वरो विवर्णता शूलं हृद्रोगः सदनं भ्रमः। अरोचकोऽतिसारश्च।
( सुउ. ५४.१८–१९ )
तत्र बहिर्मलोद्भवास्तिलप्रमाणसंस्थानवर्णाः केशाम्बराश्रया बहुपादाः सूक्ष्माश्च यूकालिक्षादिनामतो ज्ञेयाः। ते कोठपिटिकाकण्डूगण्डान् प्रकुर्वते
( असंनि. १४.४६–४७ )
आभ्यन्तराः क्रृमयः–तत्र रक्तजा रक्तवाहिशिरास्थानाः ( असंनि. १४.५४ ) सप्तसङ्ख्याकाः। नामतः केशादा रोमादा नखादा दन्तादाः किक्किशाः कुष्ठजाः परीसर्पाश्च। ते रक्तवर्णाः कृष्णवर्णाः स्निग्धाः पृथवश्च भवन्ति। तेभ्यो रक्ताधिष्ठानजा विकारा कुष्ठविसर्पपिडकादयो भवन्ति
( सुउ. ५४.१५ )
पुरीषजाः क्रृमयः सप्तसङ्ख्याकाः। तेऽजवा वियवाः किप्याश्चिप्यागण्डूपदाश्चूरवो द्विमुखाश्चेति नामतः। तेऽतीव वृद्धा आमाशयोन्मुखा यदा भवन्ति तदा आस्योद्गारनिःश्वासा विड्गन्धानुविधायिनो भवन्ति। अधोविसर्पणं तेषां स्वभावः ( असंनि. १४.५५–५६ ) एते श्वेता सूक्ष्माः केचित् पुच्छेषु स्थूलाश्च ( सुउ. ५४.९ ) पृथुवृत्ततनुस्थूलाश्यावपीतसितासिता इति ( असंनि. १४.५५ ) ते गुदानुसरणं गुदतोदनं शूलमग्निमान्द्यं पाण्डुत्वं विष्टम्भं बलसंक्षयं लालास्रावमरुचिं हृद्रोगं विड्भेदं च कुर्वन्ति ( सुउ. ५४.९–१० ) पारुष्यकार्श्यरोमहर्षांश्चेति। (असंनि. १४.५८) कफजाः क्रृमयः षट्सङ्ख्याकाः। दर्भपुष्पा महापुष्पाः प्रलूनाश्चिपिटाः पिपीलिका दारुणाश्चेति नामतो ज्ञेयाः। एतेषामेव कर्मविशेषेण मज्जादा नेत्रलेढारस्तालुश्रोत्रभुजश्चेति संज्ञान्तराणि ( सुउ. ५४.१३ ) एते रोमशा रोममूर्धानः सपुच्छाः श्यावमण्डला रूढधान्याङ्कुराकाराः शुक्लास्तनवश्च ( सुउ. ५४.१२ ) ताम्रावभासा इति ( असंनि. १४.४९ ) ते शिरोहृद्रोगवमथुप्रतिश्यायकराः ( सुउ. ५४.१२ ) हृल्लासाऽऽस्यश्रवणाविपाकारोचकमूर्च्छाज्वरानाहकार्श्यकराश्च ( असंनि. १४.५२ ) अन्तर्जाः कुष्ठैकहेतवः। तेषु कफजा अधिकतरम् ( असंनि. १४.४८ )
तत्साध्यासाध्यत्वम्–पुरीषजाः कफजाश्च दृश्याः साध्याश्च। रक्तजा अदृश्या याप्याश्च। रक्तजेष्वपि केशादरोमादनामानौ अत्यन्तादृश्यत्वादसाध्यौ
( सुउ. ५४.१९–२० )
क्रृमिरोग, क्रृमीमुळे होणारा रोग. प्रकार २. बाहेरचे व आतले असे दोन प्रकारचे किडे. आणखी **प्रकार** ४:–१ बाह्य मल २ कफ ३ रक्त ४ विष्ठा यात होणारे चार. नावाने २० प्रकार. **उत्पत्तिः**–आमाशयांत कफज, पक्काशयात पुरीषज, रक्तवाहिन्यात रक्तज, त्वचा, केश, वस्त्रे यात घामासारख्या बाह्य मळात बाह्य मलज क्रृमींची उत्पत्ति होते. **संप्राप्ति**–अजीर्णादि कारणानी वाढलेले कफादी दोष पुरीषादिकांमध्ये क्रृमि उत्पन्न करतात. क्रृमी उत्पन्न झाल्याची **लक्षणेः**–त्वचेचा वर्ण बदलणे, शूल, बेचव तोंड, अंग गळून जाणे, हृदयात वेदना, चक्कर, ज्वर, अतिसार ही लक्षणे होतात. शिवाय झोपेत दात खाणे, दचकून उठणे, हातापायांना झटके बसणे, तोंडाला पाणी सुटणे, सारखे थुंकणे, गुदद्वारात खाज वळवळणे, नाक खाजणे इ० लक्षणे होतात. घामासारख्या बाह्य मलापासून झालेले क्रृमि

उवा लिखा इ० होत. त्या खाज, चकंदळे, पुळ्या, गांठी उत्पन्न करतात. **आतले कृमि**–१ **रक्तज** रक्तवाही शिरात असतात. ते ७ प्रकारचे. नावे– १ केशाद २ रोमाद ३ नखाद ४ दंताद ( केश, रोम, नख, दात खाणारे) ५ किक्किश ६ कुष्ठज (कुष्ठात उत्पन्न होणारे ) ७ परीसर्प. ते लाल काळे स्निग्ध असतात. त्यांनी रक्ताचे विकार, कुष्ट, धावरे, पुळ्या इत्यादी होतात. पुरीषज कृमिं ७–१ अजवा २ वियवा ३ किप्य ४ चिप्य ५ गण्डूपद ( गांडुळा-सारखे ) ६ चुरु, द्विमुख ( दुतोंडी ) नावाचे. ते जेव्हा अतिशय वाढतात तेव्हा आमाशयाकडे जातात. तेव्हा ढेकर उच्छ्वास यांना विष्ठेसारखी घाण येते. खाली जाणे हा त्यांचा स्वभाव. हे पांढरे सूक्ष्म बारीक काही शेपटाला जाडे असतात. काही लांब वाटोळे, शरिराने जाड काळसर पिवळे काळे पांढरे असे निरनिराळ्या रंगाचे असतात. ते गुदाकडे जातात. गुदात टोचल्यासारखी पीडा, पोटात शूल, अग्निमांद्य, पांढरट–फिकटपणा, मलावष्टंभ, कधी मळ भसरा, दिवसे दिवस अशक्तता, लाळ गळणे, रुचि नसणे, हृद्रोग, त्वचा रखरखीत, रोमांच उभे रहाणे, व शरीरकृशता करतात.

**कफजकृमि.** ६ नावे–१ दर्भपुष्प २ महापुष्प ३ प्रलून ४ चिपिट ५ पिपीलिक ६ दारुण. यांचीच मज्जा खाणारे इ० कर्माच्या वैशिष्ट्यावरून निर-निराळी नावे दिली आहेत.

हे अंगावर व डोक्यावर लव असलेले. शेपूट असलेले पांढरे काळसर चकंदळयुक्त धान्याच्या मोडासारखे बारीक असतात. काही तांबुस असतात. **चिन्हे**– डोकेदुखी, हृदयात पीडा, ओकारी, पडसे, गळ्याशी अन्न येणे, तोंडाला पाणी सुटणे, अपचन, रुचि नसणे, पोट फुगणे, कृशता, ज्वर व मूर्च्छा.

**रक्तगत कृमि**–कुष्ठ उत्पन्न करतात. त्यात कफज कृमि आधिक्याने कुष्ठकर. साध्यासाध्यत्व–पुरीषज व कफज दृश्य व साध्य. रक्तज अदृश्य व उपचार चालू आहेत तोवर साध्य. त्यातही केशाद रोमाद हे अत्यन्त सूक्ष्म म्हणून अदृश्य. ते असाध्य.

**–कर**–पु., कीट० **सविषोऽसौ एतद्दष्टे वेगज्ञानं सर्पवद्भवति, तास्ताश्च तीव्रा वेदना भवन्ति, तथा सान्निपातिका रोगा भवन्ति, दंशस्तु वर्णेन रक्तपीतासितारुणः, क्षाराग्निदग्धवच्च** ( सुक. ८.१५–१८ )
विषारी किडा, हा चावला तर सापासारखे वेग येतात. त्या त्या तीव्र वेदना व सर्वदोषयुक्त विकार होतात. दंश रंगाने तांबडा पिवळा पांढरा लालसर व क्षार किंवा विस्तवाने जळाल्यासारखा असतो.

**–कर्णक**–पु., **कर्णरोग० वातादिभिः स्वकारणकुपितैर्दूषिते ये श्रोत्रसंबंधिनी मांसासृजी तयोर्विक्लेदस्तज्जन्याः कृमयः कर्णं भक्षयन्तस्तीव्रां रुजं कुर्युः त्रिदोषजोऽयमिति विदेहः** ( सुउ. २१.५१ )
कानाचा रोग. वातादी दोष स्वतःच्या कारणांनी प्रकुपित होऊन श्रोत्रसंबंधी मांस रक्त दूषित करून त्यांत ओलसर स्राव निर्माण झाल्यावर त्यात कृमि होऊन ते कान खातात तेव्हां तीव्र वेदना होतात. त्रिदोषांनी होणारा.

**–कोष्ठ**–वि., **क्रिमियुक्तः कोष्ठो यस्य, विरेचनयोग्योऽसौ** ( चसि. २.१३ )
कृमियुक्त कोठा असलेला. त्याला रेचक देणे योग्य.

**–ग्रन्थि**–पु., **नेत्ररोग०, तल्लक्षणम्–वर्त्मशुक्लयोः संधौ ग्रन्थिः क्रिमियुक्तो भवति । ते कृमयः कण्डूं कृत्वा अन्तश्चरन्तो नयनं दूषयन्ति । साध्योऽयम्** ( सुउ. २.९ )
डोळ्यांचा रोग. डोळ्यांच्या पापण्यां व पांढरी कवडी यांच्या सांध्यावर एक कृमियुक्त ग्रंथि होतो. ते कृमि कंडु करतात. आत शिरतात व डोळा बिघडवितात. हा रोग साध्य आहे.

**–घ्न**–न., **वनस्पति० विडङ्गम्** ( चसू. २३.१८ )
वावडिंग. कृमिनाशक.
वि., **क्रिमिनाशनम्** ( चसू. १.९७ ) कृमिनाशक.

**–घ्नगण**–पु., **द्रव्यगण० अक्षीवमरिचगण्डीरकेबुकविडङ्गनिर्गुण्डीकिणिहीश्वदंष्ट्रावृषपर्णिकाऽऽखुपर्णिका इति दशेमानि क्रिमिघ्नानि द्रव्याणि** ( चसू. ४.११, असंसू. १५.२० )
कृमिनाशक. **गण**–शेवगा, मिरे, कडवा सुरण, वावडिंग, निर्गुंडी, मालकांगोणी, गोखरू, उंदिरकानी ही दहा द्रव्ये क्रिमिनाशक आहेत.

**–घ्नवर्ग**–पु., **द्रव्यगण०** ( असंसू. १५.२० ) **द्र० क्रिमिघ्नगण.**

**–जाति**–स्त्री., **क्रिमीणां जातिः, विंशतिः क्रिमिजातयः समुद्दिष्टाः** ( चसू. १९.३ )
कृमीच्या जाति. २० जाति.

**–जिघांसु**–वि., **क्रिमिपीडितो व्याधितः कृमिहननेच्छुः** ( सुउ. ५४.४० )
क्रिमींना मारण्याची इच्छा करणारा. क्रिमियुक्त रोगी.

**–पातन**–न., उपक्रम० **गर्भस्यौषधियन्त्रशस्त्रादिभिरुपायैः पतनार्थं प्रयोगः, 'अविषह्ये विकारे तु श्रेयो गर्भस्य पातनम्'** ( सुचि. १५.११ )
उपचार–औषधि, यंत्र, शस्त्र इत्यादी उपायांनी गर्भाच्या पातनाकरिता करावयाचे उपचार.

**–पातिनी**–स्त्री., **वनस्पति० कलिकारी** ( ध. ४.९ )
कळलावी.

**–प्रस्रवण**–न., **गर्भस्रवणम्** ( सुनि. ८.१० )
गर्भस्राव. चवथ्या महिन्याच्या आतला गर्भ पडणे.

**–बाधाभय**–न., **गर्भस्य पीडाविषयकं भयम्** ( सुशा. ३.१९ )
गर्भाला पीडा होण्याची भीति.

**–भागप्रपीडन**–न., **गर्भावयवदुष्टिः, सम्प्राप्तिः– 'दोषाऽभिघातैर्गर्भिण्या यो यो भागः प्रपीड्यते। स स भागः शिशोस्तस्य गर्भस्थस्य प्रपीड्यते** ( सुशा. ३–१७ )
**माता च गर्भे प्रधानं कारणम्, येनाऽऽसेकात् प्रभृति प्रसवपर्यन्तं मातुरेव गुणदोषावनुविदधाति गर्भः** ( चक्र. चशा. ३.३ )
गर्भाच्या अवयवांची दुष्टि. गर्भिणीचा जो जो भाग दोषांच्या आघातांनी विव्हल होतो, विकृत होतो, तो तो गर्भाशयातील गर्भाचा भाग विकृत होतो. माता हीच गर्भाचे मुख्य कारण आहे. यामुळे गर्भधारणेपासून प्रसूतीपर्यंत मातेच्याच गुणदोषांचे धारण गर्भ करतो.

**–मातृ**–स्त्री., **गर्भिणी** ( अहशा. २.६२ ) गर्भिणी.

**–मार्ग**–पु., **शारीर० अपत्यपथः** ( असंशा. ३ )
गर्भ बाहेर येण्याचा मार्ग.

**–मोचन**–न., **स्वबन्धाद्गर्भस्य विमोचनम्** ( सुनि. ८.३ )
मातेशी असलेले गर्भाचे बंधन सुटणे. गर्भ बाहेर येणे, जन्म.

**–यन्त्र**–न., **यन्त्र० सर्वं यन्त्रं भूम्युदरे एव अवस्थितं विद्यात्तद्गर्भयन्त्रम्, 'गर्भयन्त्रं प्रवक्ष्यामि पिष्टिकाभस्मकारणम् । चतुरङ्गुलदीर्घां तु त्र्यङ्गुलोन्मितविस्तराम् । मृण्मयीं सुदृढां मूषां, वर्तुलं कारयेन्मुखम् ।...कर्षैस्तुषाऽग्निना भूमौ स्वेदयेन्मृदुमानवित्** ( र. ९. ३०–३३ )
एक यंत्र. जमिनीमध्ये जे यंत्र असते ते. चार अंगुले खोल व ३ अंगुले विस्ताराची ( लांबी–रुंदीची ) मातीची वर्तुलाकार तोंडाची बळकट मूस, धान्याचे तुष–कोंडा तिच्या भोवताली घालून अग्नि द्यावा. पाऱ्याच्या पिष्टीचे भस्म करण्याला उपयुक्त.

**–रस**–पु., **शुक्रशोणितसंयोगेन कललावस्थायां गर्भस्य रससाररूपता** ( चसू. ३०.९० )
गर्भाशयात शुक्र व आर्तव यांच्या संयोगानंतर जे कलल निर्माण होते, त्यात मातेच्या रसधातु इत्यादी धातूंच्या साररूपाने आलेला रस. गर्भरस.

**–रूप**–न., **गर्भलक्षणम्** ( चशा. २.८ )
गर्भाचे रूप, गर्भाचे लक्षण.

**–लक्षण**–न., **लब्धगर्भाया लक्षणम्** ( सुशा. २.४९ )
गर्भाचे लक्षण. गर्भ असलेल्या गरोदर स्त्रीचे लक्षण.

**–लिङ्ग**–न., **गर्भलक्षणम्** ( चशा. २.२३ )
गर्भाचे लक्षण–रूप.

**–वास**–पु., **गर्भस्य गर्भाशये वासः, स कलियुगे दशमासिकः, कृतयुगे सप्तरात्रावधिकः, त्रेतायामष्टमासिकः** ( काशा. ४ )
गर्भाचा गर्भाशयात निवास, राहणे. कलियुगात दहा महिने. सत्य युगात सात रात्री, त्रेतायुगात आठ महिने.

**–विघातक**–वि., **गर्भघातकरः भावः** (चशा. ४.४३)
गर्भाचा घात करणारा. गर्भाची विकृति करणारा.

**–विच्युति**–स्त्री., **गर्भविमुक्तिः गर्भस्याकालपतनम्** ( सुनि. ८.९ )
अकाली गर्भस्राव, गर्भपात.

**–विद्रव**–पु., **गर्भस्रावः अनतिघनावयवत्वेन विशेषेण द्रवरूपतया गर्भविद्रवः** ( मधुकोशः मानिमूढगर्भनिदानम् । )
गर्भस्राव. घनावस्था पूर्णत्वाने न आलेला द्रवरूप गर्भ पडणे.

**–वृद्धिप्रपीडन**–न., **गर्भवृद्धिजं प्रपीडनम्** ( अहनि. ७.१४ )
गर्भाच्या वाढीमुळे पीडा होणे ( अपान वायूचा प्रकोप होण्यामुळे. )

**–वेश्मन्**–न., **गृहान्तर्वर्तिगृहम्** ( हे अहसू. ३.१६ )
घरातले घर. माजघर.

**–व्याकरण**–न., **गर्भविषयकं विवरणम्** ( सुशा. ४.१ )
गर्भासंबंधी विवरण.
**अध्याय०** ( सुशा. ४.१ )
गर्भासंबंधी विवरण असलेला अध्याय.

**–व्यापद्**–स्त्री., गर्भसम्भवजो व्याधिः
( असंशा. ४.१ )
गर्भामुळे उत्पन्न होणारा रोग.
**गर्भव्याधिः मरणं वा तस्य लक्षणम्–गर्भिण्याः नेत्रे मुस्तोत्थिताकारे, कर्णौ पादौ च शीतलौ, केशाश्च जटिलास्तस्या गर्भो विपद्यते ।** ( काखिल. १०.१६१ ) **गर्भिण्याः नाभ्याः उपरिष्टाद्गर्भ उभे पार्श्वे निषेवते मध्ये वा तिष्ठति सोऽपि विपद्यते** ( काखिल. १०.१६३ ) **गर्भिण्याः सन्धिमोक्षे रुक् मृष्टान्नेऽरुचिर्निश्चेष्टः स्वप्नकामायास्तस्या गर्भो विपद्यते** ( काखिल. १०.१६४ ) **गर्भमृत्युहेतवः–मातुर्मानसाऽऽगन्तुभिरुपतापैः प्रपीडितः तथा व्याधिभिश्च प्रपीडितः कुक्षौ गर्भो व्यापद्यते**
( सुनि. ८.१३ )
गर्भाचा रोग किंवा मरण. लक्षणे–गर्भिणीचे डोळे नागरमोथ्यासारखे फुगलेले, कान व पाय थंडगार. केसांच्या जटा होतात तेव्हा तिचा गर्भ मरतो किंवा मेलेला असतो. बेंबीच्या वर जो गर्भ दोन्ही बाजूला पसरलेला असतो किंवा बेंबीमध्ये असतो तो मरतो. झोपाळू गर्भिणी हातपाय मोकळे करते तेव्हा वेदना होतील, पक्वान्नांची अरुचि असेल व गर्भही हालचाल करीत नसेल तर तो गर्भ मरतो. मातेच्या मानसिक वा आगन्तुक कारणांनी तसेच रोगांनी पीडलेला गर्भ मरतो.

**–शङ्कु**–पु., यन्त्र० **गर्भनिर्हरणार्थं उपयुक्तस्तत्स्वरूपं शङ्कुतुल्योऽष्टाङ्गुलः प्रणताग्रो मूढगर्भ आहरणे**
( असंसू. ३४ ( अहसू. २५.३२ )
गर्भ काढण्याकरिता उपयोगी. शंकूसारखा आठ अंगुळाचा खाली वळलेल्या टोकाचा. मूल अडल्यास ते काढण्याकरिता.

**–शय्या**–स्त्री., शारीर० **गर्भः शेते अस्यामिति गर्भशय्या नाम गर्भाशयः** ( सुशा. ५.३९ )
गर्भाची शय्या, गर्भाशय.

**–शल्य**–न., **गर्भ एव शल्यम्** ( चशा. ८.३१ )
**गर्भशल्यमाहार्याणां श्रेष्ठम्**
( चसू. २५.४० असंसू. १३ )
गर्भरूपी शल्य. बाहेर काढावयाच्या सर्व शल्यात गर्भ हे शल्य काढण्याला अति कठीण म्हणून श्रेष्ठ.

**–शातन**–न., **गर्भपातनम्** ( सुनि. ८.३ )
गर्भ पाडणे.

**–शोणित**–न., **गर्भसम्बन्धि रक्तम्**
( काखिल. ९.३७–३८ ) गर्भाचे रक्त.

**–शोष**–पु., गर्भरोग० **गर्भस्य शुष्कत्वम्, तत्रोपचरणं गर्भशोषे...क्षीरं परममुच्यते** ( काखि. २२ )
गर्भ शुष्क होणे. दूध देणे हे उत्तम.

**–संग**–पु., गर्भरोग० कर्म, **' विलोमापानवायुना गर्भो जीवन्यदि न निःसरेत् स गर्भसङ्ग इत्युक्तः** ( र. २२.१०० ) **जीवतो गर्भस्य सङ्गोऽप्रसवः** ( इन्दु असं.४ ) **सङ्गास्त्रिविधाः ' स्वभावगता अपि त्रयः सङ्गा भवन्ति शिरसो वैगुण्यादंसयोर्जघनस्य वा** ( सुचि. १५.४ ) **तत्सङ्गेऽनिलो हेतुः, अत्रानिलः प्रसूतिमारुतः, ' गर्भसङ्गे तु योनिं धूपयेत् '**
( सुशा. १०.११ )
गर्भ अडणे. अपान वायूच्या दुष्टीमुळे गर्भ जर बाहेर पडत नसेल तर त्याला गर्भसंग म्हणतात. प्रकार तीन–डोके, अंस ( खांदे ) व ढुंगण यांच्या वैगुण्यामुळे संभवतात. अशा वेळी योनीला धूप द्यावा.

**–संधारण**–न., **गर्भस्थापनम्** ( सुशा. १०.५७ )
गर्भस्थापन.

**–संपीडन**–न., **गर्भजन्यप्रपीडनम्** ( चसू. १८.६ )
गर्भामुळे होणारा त्रास.

**–संभवद्रव्य**–न., **गर्भस्य सम्भवः उत्पत्तिस्तद्धेतुभूतं द्रव्यं शुक्रशोणितादि** ( सुसू. ४.५ )
गर्भाच्या उत्पत्तीला कारण असणारे द्रव्य, शुक्र, रज ( आर्तव. ) इ०

**–संभवा**–स्त्री., वनस्पति० **एलाभेदः, भद्रैला**
( रा. ६.७ ) द्र० **' एला '**
मोठी वेलची.

**–संस्थान**–न., **गर्भस्याऽऽगमनप्रकारः यथा मूढगर्भस्य आगतिः** ( असंशा. ४ )
गर्भाचा बाहेर येण्याचा प्रकार. आडव्या आलेल्या मुलाची स्थिति.

**–समय**–पु., **प्रसूतिसमयः** ( चशा. ८.३२ )
प्रसूतीची वेळ.

**–स्थ**–वि., **गर्भावस्थायां स्थितः** ( सुशा. २.५३ )
गर्भातला, गर्भावस्थेतला.
**गर्भाशयस्थः** ( असंशा. २.६५ )
गर्भाशयात असलेला.

**–स्थापन**–न., **गर्भस्य स्थिरीकरणम्** ( चशा. ८.२० )
( चशा. ८.२४ )

वि., द्रव्यगण० गर्भस्थापनवर्गः प्रजास्थापनवर्गः ( चशा. ८.२० ) ऐन्द्री–ब्राह्मी–शतवीर्या–सहस्र–वीर्या–अमोघा–अव्यथा–शिवा–अरिष्टा–वाट्य-पुष्पी–विष्वक्सेनकान्ता, इति दश इमानि प्रजास्थापनानि भवन्ति ( चसू. ४.१८ ) गर्भस्थापनार्थं पान–स्नानधारणादिभिरुपयोगोऽस्य वर्गस्य उक्तः ( असंशा. १ ) गर्भसंधारणार्थं क्षीरमुत्पलादिसिद्धं पाययेत् ( सुशा. १०.५० )

गर्भ स्थिर राहण्यास कारण होणारा द्रव्यांचा वर्ग. गोरक्षकर्कटी, ( चिभडे ) ब्राह्मी, लहान दूर्वा, मोठी दूर्वा, पाडळ, गुळवेल, हिरडा, कुटकी, पिवळा चिकणा व गव्हला यांचा पिणे, स्नान, अंगावर धारण करणे इत्यादी प्रकारांनी उपयोग करावा. गर्भ राहण्याला निळे कमळ इ० नी सिद्ध दूध द्यावे.

**-स्थापनविधि**–पु., गर्भस्थिरीकरणविधिः, अयं विधिः गर्भस्रावपातयोः साध्याऽवस्थायामुपयुक्तः ( चशा. ८.२४ )

गर्भ स्थिर करण्याचा विधि. हा गर्भाचा स्राव, पतन यात साध्यावस्थेत उपयुक्त.

**–स्फुरण**–न., गर्भस्यावयवानां चलनम्

गर्भाचे फुरफुरणे, कंप, गर्भाच्या अवयवांची हालचाल, चलनवलन.

**–स्राव**–पु., गर्भरोग० गर्भप्रस्रवणम्, गर्भस्य द्रवावस्थायां विमुक्तिः, 'मासचतुष्टयं यावद्गर्भविमुक्तिः स्रावरूपा भवेत्' ( भोजः, गयिटीकायाम् ) ( सुनि. ८.१० )

पूर्वरूपम्–'स्त्री चेदापन्नगर्भा परिहार्याण्यासेवेत तदा बस्तिपार्श्वश्रोणियोनिमुखेषु शूलं पुष्पदर्शनं च स्यात्' ( असंशा. ४ ) साध्यासाध्यत्वम्–'असम्पूर्णत्रिमासायास्तु पुष्पदर्शने गर्भः प्रायो न तिष्ठत्यसञ्जातसारत्वात्' ( असंशा. ४ ) चिकित्सा गर्भिणीं मृदुसुखशिशिरास्तरणशयनस्थामीषदवनतशिरस्कां शीतप्रदेहपरिषेकादिभिरुपाचरेत्' ( सुशा. १०.५७ )

सहस्रधौतेन सर्पिषाऽधोनाभेः सर्वतः प्रदिह्यात्। अतिस्रवति तु रक्ते शशैणहरिणरुधिरं वा सक्षौद्रं पाययेत्। जीवनीयशृतं वा क्षीरं पिबेत्। रक्तपित्तक्रियाश्च शोधनवर्ज्याः प्रयुञ्जीत। सौम्याश्च मनोऽनुकूलाः कथाः शृणुयात्। अदृष्टशोणितां तु पलाण्डुरससिद्धं क्षौद्रयुक्तं सर्पिः पाययेत् ( असंशा. ४.२–५ ) आमान्वये विरुद्धोपक्रमत्वाद्रूक्षशीतानि प्रयुञ्जीत प्रागुपवासम्, ततो दुरालभाऽमृतोशीरपर्पटकघनचन्दनातिविषाबलाकटुङ्गधान्याकक्काथपानम्। तृणधान्यशालिषष्टिकपेयानामशनं च मुद्गादियूषैः। आमगर्भे तु पतिते मद्यानामन्यतमं सामर्थ्यतः पाययेत्। गर्भकोष्ठविशुद्ध्यर्थमार्तिविस्मरणार्थं च। ततः प्रीणनैर्बलानुरक्षिभिरस्नेहैराहारैरादोषधातुक्लेदसिद्धेः। आमगर्भशेषेण हि पुनः पुनरकुशलमनुषज्ज्येत तस्मात्तीक्ष्णैरनवशेषयन्नुपाचरेत्। ततःपरं स्नेहपानैर्बस्तिभिराहारैश्च दीपनीयपाचनीयजीवनीयबृंहणीयमधुरवातहरैरिति। ( असंशा. ४.७–९ )

यावन्तो मासा गर्भस्य तावन्त्यहानि स्त्रियं उद्दालकादीनां लवणस्नेहवर्जितयवागूभिः पाचनीयोपसंस्कृताभिरुपाचरेत् लंघनपूर्वम्। पतितगर्भाया बस्त्युदरशूलेषु पुराणगुडं दीपनीयसंयुक्तं पाययेत् ( ड. सुशा. १०.५७ )

गर्भस्रावपरिहारार्थं गर्भस्रावप्रथायां प्रातिमासिकोक्तान्काथान्योजयेत् ( सुशा. १०.६२–६४ ) ( असंशा. ४.५३–५९ )

गर्भ स्रवणे. चार महिन्यांच्या आत द्रवस्वरूप स्रावासारखा गर्भ पडतो. **पूर्वरूप**–बस्तीच्या दोन्ही बाजू कंबर योनीचे द्वार यात शूल व रजःस्राव. **असाध्यत्व**–तीन महिने पुरे होण्याच्या आत पाळी आली तर गर्भ टिकत नाही. कारण गर्भाच्या शरिरात घन असे अवयव बनलेले नसतात. **उपचार**–पूर्व रूपे दिसूं लागताच बाधक वस्तु सोडून गर्भ स्थिर करणारी द्रव्ये सेवन करावीत. मऊ थंड सुखकारक अशा अंथरुणावर मान खाली लववून गर्भिणीला निजवावे व थंड उटणी लावावी. थंड पाणीहि शिंपडावे. सहस्रधौत तुपाने बेंबीच्या खाली सर्वत्र चोपडावे, अतिस्राव होत असेल तर ससा हरीण काळवीट यांचे रक्त मध घालून द्यावे, जीवनीय गणाने सिद्ध दूध पाजावे, रक्तपित्ताचे शामक उपचार सर्व करावेत. सौम्य, मनाला आवडणाऱ्या कथा सांगाव्यात. रजःस्राव दिसत नसेल तर कांद्याच्या रसाने सिद्ध असे तूप मध घालून पाजावे. आमाचा संबंध असेल तर प्रथम लंघन घालून रूक्ष थंड अशी द्रव्ये द्यावीत. धमासा, गुळवेल, काळा वाळा, पित्तपापडा, नागरमोथा, चंदन, अतिविष, चिकणा, दिंडा, धणे यांचा काढा

पाजावा. गवती धान्ये, साळी, साठे तांदूळ, यांची पेज, मूग इत्यादिकांच्या कढणाबरोबर पाजावी. आमगर्भ पडला तर कोणतेही मद्य शक्तीप्रमाणे पाजावे; याने गर्भाशयाची शुद्धि होते आणि वेदना जाणवत नाहीत. नंतर शक्ति राखणारे आवडणारे रूक्ष असे आहार द्यावेत म्हणजे दोष व धातूंतील त्रासदायक ओलावा नाहीसा होतो. आमगर्भ शिल्लक राहिला तर पुनः पुन्हा प्रकृति बिघडते म्हणून तीक्ष्ण औषधांनी तो काढून टाकावा व उपचार करावे, नंतर स्नेह पाजून बस्ति देऊन आहारही स्निग्ध दीपक पाचक जीवनशक्ति वाढविणारी पौष्टिक गोड वातहारक अन्नपान व औषधे द्यावीत. जितक्या महिन्यांचा गर्भ असेल तितके दिवस लंघन देऊन कोद्रूची पेज मीठ व तूप तेल न घालता पाचक द्रव्ये घालून पाजावी. गर्भ पडल्यावर बस्ति पोट यात शूल असेल तर जुना गूळ दीपक द्रव्यांबरोबर पाजावा. गर्भस्राव होण्याची खोड जावी म्हणून प्रत्येक महिन्याला द्यावयाचे सांगितलेले काढे द्यावेत.

**( -स्त्रावी )** स्त्री., **गर्भं स्रवति इति । रोग० वन्ध्यत्वम्, यत्र चतुर्थमासात्प्राक् गर्भिण्याः गर्भः स्रवति** ( र. २२.४ )
स्त्रियांचा रोग. चार महिन्यांच्या आतला गर्भ स्रवणे. वंध्यत्व.
स्त्री., **वनस्पति० हिन्तालः** ( रा. ९.९७ ) शिंदी.

**-स्रू**-स्त्री., **गर्भं स्रवति इति गर्भस्रूः । गर्भस्राविणी** ( काचिगुल्म. अ. १५-१७ )
गर्भस्राव होणारी.

**-हृदय**-न., **गर्भावयव० गर्भस्य हृदयम्** ( सुशा. ३.१८ )
गर्भाचा अवयव. गर्भाचे हृदय.

**गर्भात्मन्**-पु., **अन्तरात्मा, जीवः, ‘गर्भात्मा ह्यन्तरात्मा यस्तं जीव इत्याचक्षते’** ( चशा. ३.८ )
गर्भाचा आत्मा. जीव.

**र्भाधान**-न., **गर्भस्योत्पादनार्थं क्रिया** ( सुशा. १०.५६ )
गर्भाचे उत्पादन होण्याकरिता करावयाची क्रिया.

**ाप्यायन**-न., **गर्भपोषणम्, गर्भवृद्धिः** ( सुशा. १०.६४-६५ ) गर्भाचे पोषण, गर्भवृद्धि.

**र्भाम्भस्**-न., **गर्भोदकम्** ( असंउ. १ )
गर्भाच्या भोवती असणारे पाणी.

**गर्भारि**-स्त्री., **वनस्पति० एलाभेदः सूक्ष्मैला** ( रा. ६.६९ ) द्र० ‘एला’
लहान वेलची. वेलदोडा.

**गर्भार्थिनी**-स्त्री., **अपत्यकांक्षिणी** ( सुचि. १५.३५ ) **गर्भकांक्षिणी** ( चचि. ११.७७ )
गर्भाची इच्छा करणारी, मुलाची इच्छा असलेली.

**गर्भावक्रान्ति**-स्त्री., **गर्भस्य मेलकः उत्पत्तिः** ( चशा. ३.१, चशा. ४.१ ) गर्भाची उत्पत्ति.

**गर्भावक्रान्तिशारीर**-न., अध्याय० ( सुशा. ३.१ ) ( चशा. ४.१ ) ( काशा. )
गर्भाची उत्पत्ति दिलेला अध्याय.

**गर्भाशय**-पु., **स्त्रीशारीर० योन्यास्तृतीयाऽऽवर्ते तस्य स्थानम्** ( सुशा. ५.४३-४५ ) **‘धरा गर्भाशयः प्रोक्तः’** ( भाप्र ) **स आशयविशेषः** ( सुशा. ५.८ )
**गर्भाधारः यत्र गर्भशय्या प्रतिष्ठिता** ( ड. सुसू. १४.१८ )
**गर्भस्याशयः अवस्थानप्रदेशः** ( सुनि. ८.३ )
**तस्य स्थानम्-स्त्रीणां तु बस्तिपार्श्वगतो गर्भाशयः संनिकृष्टः** ( सुचि. ७.३३ ) **भगस्याऽधः स्त्रियाः बस्तिरूर्ध्वं गर्भाशयः स्थितः । गर्भाशयश्च बस्तिश्च महास्रोतःसमाश्रितौ** ( वैतरणः डल्हणटीका ) ( सुचि. ७.३३ )
**रूपम्**—**‘यथा रोहितमत्स्यस्य मुखं भवति रूपतः। तत्संस्थानां तथारूपां गर्भशय्यां विदुर्बुधाः ॥’** ( सुशा. ५.४४-४५ ) **स जरायुणा परिवीतः** (काशा गर्भावक्रान्ति अ. ९) **आर्तववहस्रोतसां मूलं गर्भाशयः** (सुशा. ९.१२) **‘सूक्ष्माः केशप्रतीकाशा बीजरक्तवहाः सिराः । गर्भाशयं पूरयन्ति मासाद्बीजाय कल्पते’** (इति विश्वामित्रः सुसू. १४.१०).
गर्भाशय. योनीच्या आत तिसऱ्या वर्तुळ विभागात वळणावर याचे स्थान आहे. गर्भाचे आधार स्थान. स्त्रीच्या बस्तीच्या मागे लागून गर्भाशयाचे स्थान आहे. **आकार** रोहित माशाच्या तोंडासारखे गर्भाशयाचे तोंड असते. आणि त्याच्या आकाराचा तो असतो. बाहेर तोंड लहान पण आत मोठा अवकाश असतो. त्याच्यावर अंतस्त्वचेचे आवरण असते; तिने तो वेष्टिलेला असतो. सूक्ष्म केशवाहिन्या शिरा गर्भाशयात रक्त पूरण करतात, महिन्याच्या अंतरा अंतराने बीजही पुरवितात.

**गर्भाशयबीजभाग**–पु., स्त्रीकरभाव० गर्भाशयोत्पत्ति–बीजभागः, गर्भाशयस्य तथा बीजस्यार्तवरूपस्य जनको भागः ( चक्र. चशा. ४.३० चशा. ४.१४ ) गर्भाशय ज्या पासून उत्पन्न होतो तो बीजातील अंश. गर्भाशय व शुक्र आर्तवाचा निर्माता जो बीजातील अंश तो.

**गर्भाशयशूल**–पु., लक्षण० गर्भाशये शूलः स शूलः गर्भाशयकटिवङ्क्षणेषु भवति ( सुशा. १०.५७ ) गर्भाशयात शूल होणे, हा शूल गर्भाशय कमर व जांघ यात होतो.

**गर्भासना**–स्त्री., स्त्रीशारीर० गर्भाशयः ( चसि. ९.६२ ) गर्भाशय.

**गर्भास्पन्दन**–न., लक्षण० गर्भस्याचलनं । निश्चलत्वम्, अन्तर्मृतगर्भलक्षणम् ( सुनि. ८.१२ ) ( असंशा. ४ ) गर्भाचे चलनवलन न होणे, निश्चलपणा. आत गर्भ मेल्याचे लक्षण.

**गर्भिणी**–स्त्री., स्त्रीणामवस्था० गर्भयुक्ता स्त्री ( चनि. ३.१४ ) गर्भवती ( अहृसू. १४.९ )

**सामान्यलक्षणम्**–स्तनयोः कृष्णमुखता रोमराज्युद्गमः । अस्याः अक्षिपक्ष्माणि संमील्यन्ते अकामतश्छर्दयति, शुभाद् गन्धादुद्विजते, प्रसेकः सदनं च भवति ( सुशा. ३.१४–१५ ) आर्तवाऽदर्शनमास्यास्रवणमनन्नाभिलाषोऽरोचकोऽम्लकामता गुरुगात्रत्वं स्तनयोः स्तन्यमोष्ठयोः कार्ष्ण्यं श्वयथुः पादयोः योन्याश्चाटालत्वं विवृतत्वम्
( चशा. ४.१६ )

**मासविशेषलक्षणम्**–चतुर्थे मासि लक्षणम्–गर्भिणी गुरुगात्रत्वमधिकमापद्यते विशेषेण
( चशा. ४.२० )

'पञ्चमे मासि गर्भस्य मांसशोणितोपचयो भवति–...तस्मात्तदा गर्भिणी कार्श्यमापद्यते विशेषेण'
( चशा. ४.२१ )

'षष्ठे मासि...गर्भिणी बलवर्णहानिमापद्यते विशेषेण' ( चशा. ४.२२ )

'सप्तमे मासि...गर्भिणी सर्वाकारैः क्लान्ततमा भवति' ( चशा. ४.२३ ) 'अष्टमे मासि गर्भश्च मातृतो गर्भतश्च माता...मुहुर्मुहुरोजः परस्परत आददाते...तस्मात् गर्भिणी मुहुर्मुहुर्मुदा युक्ता भवति मुहुर्मुहुश्च म्लाना' ( चशा. ४.२४ )

**गर्भिणीपरिचर्या**–गर्भिणी नित्यस्नाता मृष्टा सुप्रक्षालनादपनीतशरीरमला शुक्लवस्त्रधरा शुचिः देवविप्रपरा सौम्या च सदा भवेत्'
( काखिल. १०.१७६–१८१ )
( का. गर्भिणीचिकित्सा० )

'गर्भिणी प्रथमदिवसात्प्रभृति नित्यं प्रहृष्टा शुच्यलङ्कृता शुक्लवसना शान्तिमङ्गलदेवताब्राह्मणगुरुपरा च भवेत्, मलिनविकृतहीनगात्राणि न स्पृशेत्, दुर्गन्धदुर्दर्शनानि परिहरेत्, उद्वेजनीयाश्च कथाः, शुष्कं पर्युषितं कुथितं क्लिन्नं चान्नं नोपभुञ्जीत, बहिर्निष्क्रमणं शून्यागारचैत्यश्मशानवृक्षाश्रयान्क्रोधभयसङ्करांश्च भावानुच्चैर्भाष्यादिकं च परिहरेद्यानि च गर्भं व्यापादयन्ति, न चाभीक्ष्णं तैलाभ्यङ्गोत्सादनादीनि निषेवेत, नचायासयेच्छरीरं पूर्वोक्तानि च परिहरेत्, शयनासनं मृद्वास्तरणं नात्युच्चमपाश्रयोपेतमसम्बाधं च विदध्यात्, हृद्यं द्रवं मधुरप्रायं स्निग्धं दीपनीयसंस्कृतं च भोजनं भोजयेत्, सामान्यमेतदाप्रसवात् ।' ( सुशा. १०.३ ) अष्टमे...आस्थापयेत्पुराणपुरीषशुद्ध्यर्थमनुलोमनार्थं च वायोः, ततः पयोमधुरकषायसिद्धेन तैलेनानुवासयेत् । अनुलोमे हि वायौ सुखं प्रसूयते निरुपद्रवा च भवति । अत ऊर्ध्वं स्निग्धाभिर्यवागूभिर्जाङ्गलरसैश्चोपक्रमेदाप्रसवात् । एवमुपक्रान्ता स्निग्धा बलवती सुखमनुपद्रवा प्रसूयते' ( सुशा. १०.४ ) 'पिचुं चास्या योनौ निधापयेत् । शीतं वातघ्नपत्रभङ्गाम्भ स्नानेऽन्वहं हितम् ॥ निःस्नेहाङ्गीं नवमात् मासात्प्रभृति न वासयेत्–स्थापयेत्
( अहृशा. १.६८–६९ )

'प्राक्चैव नवमान्मासात्सूतिकागृहमाश्रयेत् । तत्र सा सूतिमुदीक्षेत सूतिका परिवारिता'
( अहृशा. १.७३–७४ )

**गर्भिणी**–तीक्ष्णौषधव्यवायव्यायामवर्जनीयानां श्रेष्ठा ( चसू. २५.४० ) ( असंसू. १३ )

**गर्भिणीपरिहार्यविषयाः**–'तदा प्रभृति व्यवायमतितर्पणमतिकर्शनं दिवास्वप्नं रात्रिजागरणं शोकं यानारोहणं भयमुत्कटुकासनं चैकान्ततः स्नेहादिक्रियां शोणितमोक्षणं चाकाले वेगविधारणं च न सेवेत' ( सुशा. ३.१६ ) साऽस्नेह्या
( चसू. १३.५४ )

अस्वेद्या ( चसू. १४.१६ ) अवम्या
( अहृसू. १८.३ )

अनास्थापनीया ( सुचि. ३५.२१ )

' **गर्भिणी**......नैवोन्नता न प्रणता न गुरुं धारयेच्चिरम्। उद्वेजनं तथा हास्यं सङ्घातं चाऽपि वर्जयेत्' (का० गर्भिणीचिकित्सा०) 'सूत्रेण तनुना रज्वा स्तम्भनं बन्धनानि च। वर्जयेद्गर्भिणी नित्यं कामं बन्धानि मोक्षयेत्' (का जातिसूत्रीय) (शा०) **गर्भिणीरोगचिकित्सा**—

**गर्भिणीपुष्पदर्शने** प्रायो गर्भो न तिष्ठति असञ्जातसाराऽवस्थायाम्, तत्र गर्भस्रावोपक्रमणवत् चिकित्सा (असंशा. ४) 'गर्भिणीव्याध्युत्पत्तौ... गर्भोऽविरुद्धाश्च क्रिया यथायोगं विदधीत मृदुप्रायाः (सुशा. १०.६७) चतुर्थे मासि—जायमाने **कफरोगे** सर्पिर्भिरन्नपानैर्वा फलयुक्तेन क्षीरेणेक्षुरसेन वा वामयेत्, **पित्तरोगे** चतुरङ्गुलसिंद्धन रसेन पयसा वा विरेचयेत्, **वातरोगे** वातमूत्रनिरोधे शूले वा एरण्डपत्रं क्षीरेण पिबेत् (काखिल. १०.१४७—१५१) पञ्चमे मासि—मधुरं चाऽनुवासनं हितम् (काखिल. १०.१५२) सप्तमे मासि—गर्भिण्याः पीनमांसस्य शमनं क्षारकर्मोऽग्निकर्म भग्नास्थिचिकित्सां तथाऽस्थिश्लेषणचिकित्सां शस्त्रकर्म च प्रयोजयेत्
(काखिल १०.१५४—१५५)

**गर्भिणीज्वरचिकित्सा**—तृणपुष्पाणां गन्धाद्गर्भिण्या जायते ज्वरः। गर्भिणीनां ज्वरोष्मणाऽभितप्तो गर्भो विक्रियां याति (काखिल. १०. ४—१०) गर्भिणीज्वरे उत्पन्नायां तृष्णायां जलं नात्युष्णं पातव्यम्। वातश्लेष्मसमुत्थे ज्वरे शीतं जलं विषवद्भवति। पित्तकृते ज्वरे शृतशीतं जलं प्रशस्यते। (काखिल. १०.१२—१५) गर्भिण्याः **तरुणे ज्वरे नस्यं न देयम्**, नस्यदानेन गर्भः कुणिरन्धो दुर्बलेन्द्रियो वा जायते, शिरोविरेकेण वातरोगी भवति, धूमपानेन गर्भः पतेद्विवर्णो वा जायते, तस्मादेतानि गर्भिण्यै न प्रदापयेत् (काखिल. १०.१८—२८)

**जीर्णज्वरे** चि० वातघ्नैरौषधैः सिद्धं क्षीरं यवागूर्वा रसो वा हितः (काखिल. १०.४३—६४) गर्भिण्या **आमातिसारे** पाचनानि पक्वातिसारे सङ्ग्रहणानि दद्यात् (काखि. १०.७०—९०) अपतानके आक्षेपके च चि०—' मातुलुङ्गरसः पेयो बिडसैन्धवसंयुतः (काखिल. १०.१११—११२) पार्श्वोपग्रहे—पार्श्वस्तम्भे दशमूलयूषो देयः
(काखिल. १०.१०६—१०७)

**मुखपाके** चि०—हरिद्रादारुनिष्क्वाथं कवलार्थं ग्राहयेत् (काखिल. १०.१०८—१०९)

**कामलाचिकित्सा**—' पिप्पल्यं कोठमूलानि वाजिलिण्डरसस्तथा। दधि माहिषम् देयम्'
(काखिल. १०१२७—१२८)

**हृच्छूलचिकित्सा**—वातिके सैन्धवयुतो मातुलुङ्गरसो योज्यः, पैत्तिके प्रियङ्गुपिप्पलीभद्रमुस्ताहरेणुबदरचूर्णं च क्षौद्रेण सह समुपयोज्यम्, श्लैष्मिके पिप्पलीपत्र—चोच—प्रियङ्गुचूर्णं मातुलुङ्गरसैः सह लेह्यम् (काखिल. १०.१२८—१३०)

**कासचिकित्सा**—वातिके कर्कटशृङ्गी—शरट—भार्गी—पिप्पलीचूर्णमातुलुङ्गरसप्लुतं लेह्यम्, पैत्तिके मधूलिका—गोक्षीरी—पिप्पली—द्राक्षा—शर्कराक्षौद्रयुक्ता लेह्या, श्लैष्मिके पिप्पली—त्रिफला—रास्ना—भद्रदारुचूर्णं समाक्षिकं लेह्यम् (काखिल. १०.१३१—१३५) क्षतकासे मधुक—शङ्खचूर्णजीवलाक्षा—शर्करा मधुसहिता लेह्या (काखिल. १०.१३४—१३५) **श्वासकासचिकित्सा**—मयूरपिच्छश्वाविच्छल्यकरोमाणि पिप्पलीतण्डुलकोलमूलचूर्णं मधुसर्पिर्भ्यां लिहेत्
(काखिल. १०.१३५—१३६)

**हिक्काचिकित्सा**—पिप्पलीगैरिकभार्गी-हिङ्गुकर्कटकीनां समभागानां लेहः (काखि. १०.१४२)

**मूत्रग्रहचिकित्सा**—शतावरी दर्भमूलं मधुकं क्षीरमोरटः। पाषाणभेदकोशीरं कतकस्य फलानि च॥ एषां क्वाथरसं कल्कं क्षीरं वा पाययेद्भिषक्। मूत्रग्रहेषु सर्वेषु...(काखिल. १०.१४४—१४५)

विषचिकित्सा—वमनादिर्विषघ्नैस्तु संसृष्टः स्वादुपक्रमः॥ पाठाऽमृता सोमवल्कं द्वे सहे कुटजं तथा॥ क्षीरक्वथितमेतत्तु पेयं नार्या विषापहम्
(काखिल. १०.१५६—१५७)

**छर्दिचिकित्सा**—मातुलुङ्गरसः लाजाः कोलमज्जाऽञ्जनं दाडिमसारः इत्येषां सशर्कराक्षौद्रो लेहः वातात्मिकां छर्दिं हन्ति। दाडिमाम्लो रसः लवणवर्जितो वातच्छर्दिहरः। शर्करामधुसंयुक्तं लाजचूर्णसमायुतम् चातुर्जातककल्केन हृद्यं पुष्पैः सुवासितम्। तण्डुलधावनसहितं पित्तच्छर्दिप्रशमनम्। आम्रजम्बुप्रवालानि सितानि सुशृतानि तु। क्षौद्रयुक्तानि पेयानि श्लेष्मच्छर्द्यां विशेषतः (काखिल. १०.११८—१२४) तत्र पथ्यम्—भोजनार्थे हितं यूषं मुद्गैर्दाडिमसाधितं व्यपेतस्नेहलवणं हृद्यं छर्दि-

विनाशनम् (काखिल. १०.१२४-१२५) **गर्भिणीशोथचिकित्सा**-भद्रदारुसहितं वर्षाभू-मूलक्वाथं गर्भिणीशोथनाशार्थं मधुसंयुक्तं पिबेत् (काखिल. १०.१२६-१२७) **ऊर्ध्ववात-चिकित्सा**-भद्रदारुहरीतक्यौ सैन्धवं कुष्ठमेव च। सफाणितं घृतं चैव लेह ऊर्ध्वानिलापहः (काचि गर्भिणी चि० (काखिल. १०.१४१) उदावर्त-**चिकित्सा**-'उदावर्तो हि समुपेक्षितः सहसा सगर्भां गर्भिणीमतिपातयेत्, तं वातहरस्निग्धान्न-पानैरुपाचरेत्। मधुकसिद्धेन तैलेनानुवासयेत्। तदसिद्धौ निरूहयेत् विगतविबन्धां च स्नातामशितां सायं तेनैव तैलेनानुवासयेत् (असंशा.४.२५ **आसन्नप्रसवलक्षणम्**-'तत्रोपस्थितप्रसवायाः कटीपृष्ठं प्रति समन्ताद्वेदनाभवत्यभीक्ष्णं पुरीष-प्रवृत्तिर्मूत्रं प्रसिच्यते योनिमुखाच्छलेष्मा च' (सुशा. १०.७ असंशा. ३.) **प्रसवमानायाः लक्षणम्**-'जाते हि शिथिले कुक्षौ मुक्ते हृदय-बन्धने। सशूले जघने नारी ज्ञेया सा तु प्रजायिनी (सुशा. १०.६)

स्त्रीची अवस्था. गर्भयुक्त स्त्री. गर्भवती. गरोदर स्त्री. **सामान्य लक्षण** स्तन व ओठ यावर काळेपणा येतो. केसांच्या रांगा उत्पन्न होतात. डोळ्याच्या पापण्या मिटल्यासारख्या दिसणे, इच्छा नसता ओकारी, आवडणारे सुगंध आवडेनासे होतात, तोंडाला पाणी सुटते, अंग गळते, पाळी टळते, अन्नावर इच्छा होत नाही, अरुचि, आंबटाची इच्छा, अवयव जड वाटतात. स्तनात दूध, पायावर सूज, योनि विस्तृत होते. **महिन्यांची लक्षणे**-चवथ्यात अवयव विशेष जड वाटतात. पाचव्यात गर्भाचे रक्त व मांस अधिक वाढतात व त्यामुळे गर्भिणी कृश होते, सहाव्यात बळ वर्ण कमी होतात. सातव्या महिन्यात सर्वतः गळाठलेली होते. आंठव्यात आई-कडून गर्भ व गर्भाकडून आई असे परस्परांपासून ओज घेतात, त्यामुळे गर्भिणी मधून मधून आनंदी, प्रसन्न होते तर मधून मधून म्लान होते. **गर्भिणीचे आचरण**-नेहमी स्नान करावे, शारीरमल बाहेर काढून मलद्वारे चांगली धुवावीत, पवित्र रहावे, देव ब्राह्मण यांची पूजा करावी व नेहमी सौम्य, शांत, आनंदी, मंगलमय असावे, पांढरी वस्त्रे व अलंकार नेहमी ल्यावे, मलिन विकृत तुटक्या अवयवांना स्पर्श करू नये. दुर्गंध, कुरूप दृश्ये व उद्वेग उत्पन्न करणाऱ्या गोष्टी टाळाव्यात. सुकलेले, शिळे, नासलेले, पाणी सुटलेले अन्न खाऊ नये. बाहेर फिरणे, रिकामे घर, पिंपळाचा पार, स्मशान, झाडाचा आश्रय, संताप, भय इत्यादी भाव, मोठ्याने बोलणे, जे जे गर्भाला उपद्रवकारक असेल ते ते टाळावे. नेहमी अभ्यंग उटणी इत्यादी लावू नयेत. दमायला होईल असे श्रम करू नयेत, शय्या व बैठक मऊ, वर चादर असलेली, फार उंच नसलेली, आधारयुक्त व मोकळी असावी; स्निग्ध दीपक द्रव्यांचा संस्कार केलेले गोड पदार्थ प्राधान्याने आहारात असावे. सामान्यतः प्रसूतीपर्यंत असे वागावे. आठव्या महिन्यात जुना मळ काढून टाकण्याकरिता, वात व मळ योग्यवेळी बाहेर जावेत म्हणून शोधक बस्ति द्यावा. वायु व्यवस्थित आपल्या मार्गाने जात असेल तर स्त्री उपद्रव न होता प्रसूत होते. नंतर दूध गोड काढा यानी सिद्ध केलेल्या तेलाचा बस्ति द्यावा. नंतर स्निग्ध पेज, पाणी कमी असलेल्या प्रदेशातील प्राण्याच्या मांसाचे रस प्रसूतीपर्यंत द्यावेत. अशा उपचारांनी गर्भिणी स्निग्ध बलवान् होते व उपद्रव न होता सुखाने प्रसूत होते. योनीत तेलाचा बोळा ठेवावा. वातघ्न (एरंड इ०) पानांच्या उकळलेल्या पण थंड पाण्याने दररोज स्नान हितकर असते. नवव्या महिन्यानंतर अभ्यंग केल्यावाचून राहू नये. नववा लागण्यापूर्वीच सूतिकागृहात जावे व अनुभविक बायकांच्या परिवारात राहून वेळेची वाट पहावी. तीक्ष्ण औषधे, संभोग, व्यायाम ज्यांना वर्ज्य आहेत यात गर्भिणी श्रेष्ठ. **गर्भिणीला वर्ज्य गोष्टी**-गर्भ राहिल्यापासून संभोग, पौष्टिक किंवा कृश करणाऱ्या उपचारांचे अतिसेवन, दिवसा झोप, रात्री जागरण करणे, शोक, वाहनावर बसणे, उकिडवे बसणे, भीति ही कटाक्षाने सर्वस्वी टाळावीत. अकाली स्नेहन, स्वेदन, इत्यादी कर्मे रक्तस्राव व मलमूत्रादिकांचे उत्सर्जन, वेग यांचे धारण करू नयेत. ओकारी व शोधक बस्ति देण्याला ती अयोग्य आहे. गर्भिणीने फार वेळ ताठ, ओणवे असू नये. जड पदार्थ उचलू नयेत. घट्ट नेसू नये, कठिण पदार्थाचे सेवन करू नये. **उपचार-रोगोपचार**-पाळी आली तर बहुधा गर्भ टिकत नाही, त्यावेळी गर्भशरिरात घट्ट कठिण असे घटक झालेले नसतात. गर्भस्रावाची चिकित्सा करावी. इतर रोगात गर्भाला घातक होणार नाहीत असे यथायोग्य पण मृदु उपचार करावेत.

चवथ्या महिन्यात कफरोग झाला तर फळांचा उसाचा रस किंवा दूध यांबरोबर वांतीचे औषध द्यावे, पित्त रोगात वहाव्याच्या गराने मांसरस किंवा दूध सिद्ध करून ते रेचक म्हणून द्यावे. वातरोगात वातमूत्रांचा रोध झाला तर किंवा शूल झाला तर एरंडाच्या पानाचा रस दुधाबरोबर द्यावा. **पांचव्यात** गोड रसाने सिद्ध स्नेहाचा बस्ति द्यावा. **सातव्या महिन्यात** मांस अधिक पुष्ट असेल तर शामक क्षार अग्नि यांचे उपचार हाड मोडल्याचे निखळल्याचे शस्त्रक्रिया इत्यादि उपचार करावे. **ज्वराचे उपचार**–गवती फुलांच्या वासाने ताप येतो, त्याने गर्भात विकृति होते. या तापात तहानेवर कोमट पाणी द्यावे, **वातकफात्मक ज्वरात** थंड पाणी विषाप्रमाणे असते. **पित्तज्वरात** तापवून थंड केलेले पाणी उत्तम. **तरुणज्वरात** नस्य देऊं नये, दिल्यास थोटका अंधळा किंवा दुबळ्या इंद्रियांचा गर्भ होतो. डोक्याच्या रेचकाने वातरोगी, धूम्रपानाने वर्ण बिघडेल किंवा गर्भपात होईल. म्हणून हे सर्व वर्ज्य. **जीर्णज्वरात**–वातघ्न औषधांनी तयार केलेले दूध, पेज किंवा रस हितकर **अपक्व अतिसारात**–पाचके व पक्व अतिसारात मळ घट्ट करणारी स्तंभके द्यावीत. आचके किंवा तणावे असले तर महाळुंगाचा रस बिडलोण सैंधव घालून द्यावा. फासळ्या जखडल्या तर दशमुळानी तयार केलेले कढण द्यावे, **तोंड आले**– तर हळद, दारुहळद यांच्या काढ्यानी गुळण्या कराव्या. **कावीळ**–पिंपळी, अंकोलमूळ, घोड्याच्या लेंडीचा रस, व म्हशीचे दही द्यावे. **हृदयात शूल असेल तर-वात**–सैंधवयुक्त महाळुंगाचा रस, **पित्त**–गव्हला, पिंपळी, नागरमोथा, वाटाणा, बोरे यांचे चूर्ण मधात द्यावे. **कफ**–पिंपळी, तमालपत्र, दालचिनी, गव्हला, महाळुंगाच्या रसात चाटवावा. **खोकला-वात**–काकडशिंगी, कुसुंबा, भारंगमूळ, पिंपळीचूर्ण, महाळुंगाच्या रसांतून चाटवावे. **पित्तज** ज्येष्ठमध, गोखरू, पिंपळी, मनुका साखर व मध. **कफ**–पिंपळी, त्रिफळा, रास्ना, देवदार व मध चाटवावे. **क्षत**– ज्येष्ठमध, शंख, लाख, साखर व मध. **कफज-श्वास**–मोराचे पीस, साळईची पिसे, ( बाण ), पिंपळी, तांदुळजाचे बोराचे मूळ यांचे चूर्ण मध तुपात चाटवावे. **उचकी**–पिंपळी व काव, भारंगमूळ, हिंग, बोर समभाग चाटण. **मूत्रावरोध**–शतावरी, दर्भमूळ, ज्येष्ठमध, दुधी, मोरवेल, पाषाणभेद, काळावाळा, निवळीचे फळ, यांचा काढा, रस, चटणी किंवा दूध पाजावे. **विष**–विषनाशक वामक रेचक इत्यादींनी शुद्ध शरीर झाल्यावर पहाडमूळ, गुळवेल, खैर ( पांढरा ) पिवळी निळी कोऱ्हांटी, कुडा, दुधात कढवून ते द्यावे. **वांती-वातज**–महाळुंग, लाह्या, बोराचा मगज, सुरमा, डाळिंब बी, साखर, मधाबरोबर चाटण. आंबट डाळिंबाचा सैंधव मीठ न घालता रस ही उपयुक्त. **पित्तज**–सुगंधी फुलांनी सुगंधी केलेल्या तांदुळाच्या धुवणातून दालचिनी वेलदोडा तमालपत्र नागकेशर यांची चटणी व लाह्याचे चूर्ण मध साखर घालून द्यावे. **कफज**– आंबा जांभूळ यांची पाने व अंकूर चांगली शिजवून काढा मध घालून पिण्यास द्यावीत, **पथ्य**–मूग व डाळिंबाचे कढण त्यात स्नेह व मीठ न घालता द्यावे. **सूज**–पुनर्नवा मुळाचा नागरमोथ्यासह काढा करून तो मध घालून द्यावा. **ऊर्ध्ववात**–देवदार हिरडा सैंधव कोष्ठ तूप व काकवी यांचे चाटण द्यावे, मलमूत्रांचे वेग धारण केल्याने वात **उदावर्त करतो**–त्यावर उपचार न केले तर तो गर्भासह गर्भिणीस मारतो, तेव्हा वातहारक स्निग्ध अन्नपान द्यावे, ज्येष्ठमधाने तेल तयार करून त्याचा बस्ति द्यावा, जर त्याने बरे वाटले नाही तर शोधक बस्ति द्यावा. वाताचा अवरोध नाहीसा झाला की तिला स्नान घालून जेवण झाल्यावर सायंकाळी त्याच तेलाने बस्ति द्यावा. **काही वेळात प्रसूत होणार असल्याची लक्षणे**–कमर पाठ व भोवताली सारख्या वेदना, लघ्वीला व शौचाला सारखे होते. व योनीतून स्राव होतो. **प्रसूत होत असले-लीची लक्षणे**–कुशी ढिल्या झाल्यावर हृदयाशी गर्भाचा असलेला बंध मोकळा होऊं लागतो, जांघेत शूल होतो.

**–चिकित्साध्याय**–पु., अध्याय०

( का. गर्भिणी चि० )

अध्यायाचे नाव. गर्भिणीचे उपचार सांगितलेला.

**–मातृक**–पु., **गर्भिणी माता यस्य सः । तदुक्तम्**
**'गर्भिणीमातृकः क्षिप्रं स्तन्यस्य विनिवर्तनात् ।**
**क्षीयते म्रियते वाऽपि स फक्को गर्भपीडितः'**

( का. फक्कचि. ११ )

ज्या स्तनपान करणाऱ्या मुलाची आई गर्भिणी आहे अशा मुलाचे दूध एकदम सोडवले तर ते मूल क्षीण होते किंवा मरतेही. अशा त्याच्या विकाराला फक्क रोग म्हणतात.

**–व्याकरण**–न., **अध्यायसंज्ञा०** ( सुशा. १०.१ )
अध्यायाचे नाव. गर्भ व गर्भिणीची माहिती असलेला.

**गर्भोत्पत्ति**–स्त्री., **गर्भसम्भवः** ( सुशा. २.३५ )
गर्भनिर्मिति. गर्भ उत्पन्न होणे.

**गर्भोत्पाद**–पु., **गर्भजननम्, शुक्रधातोः कर्म** ( असंसू. १. अहृसू. ११.४ )
गर्भ निर्माण करणे हे शुक्र धातूचे कर्म.

**गर्भोत्पीडन**–न., **गर्भवृद्धिप्रपीडनम्** ( असंशा. ३ )
गर्भवृद्धीमुळे पीडा होणे.

**गर्भोदक**–न., **आविप्रादुर्भावादनन्तरं योनितो यदुदकं वर्तते तत्** ( असंशा. ३ )
प्रसूतीच्या वेळी वेणा सुरू झाल्यावर योनीतून जे पाणी स्रवते ते.

**गर्भोदकप्रवाह**–पु., **गर्भोदकस्य स्रावः** ( असंशा. ३ ) **आविप्रादुर्भावादनन्तरं जरायुर्मार्गं प्रतिपद्यते गर्भोदकसहितः** ( चशा. ८ )
( चरक-इंग्लिशभाषान्तरम्, डॉ. मेहता ) ( चशा. ८ )
गर्भाभोवती असलेल्या पाण्याचा प्रवाह–स्राव. पाणमोटली फुटल्यावर होणाऱ्या स्रावाचा प्रवाह.

**गर्भोदकस्रुति**–स्त्री., **गर्भोदकस्य स्रावः, आविप्रादुर्भावादनन्तरं गर्भोदकस्य योनितः स्रावः** ( अहृशा. १.७६ )
गर्भाभोवती असलेल्या पाण्याचा स्राव वेणा सुरू झाल्यानंतर होतो.

**गर्भोपघातकर**–वि., **गर्भनाशकरः** ( चशा. ४.१७ ) ( चशा. ४.१८ ) ( असंशा. २ ) गर्भाचा नाश करणारे.

**गर्भोपचरणीय** –वि., **गर्भोपचरणमधिकृत्य कृत इति गर्भोपचरणीयः, 'अधिकृत्य कृते ग्रन्थे'... अध्याय०** ( असंशा. ३ ) अध्यायाचे नाव.

**गर्भोपपत्ति**–स्त्री., **बीजग्रहणकालः, गर्भोपपत्तिर्नाम गर्भोपलब्धिः तद्विशिष्टः कालोऽत्र सूच्यते** ( चक्र. चशा. २.२५ )
गर्भाची उत्पत्ति. गर्भाच्या उत्पत्तीचा–बीजग्रहणाचा काल.

**गर्भोपाकर्णिक**–पु., **धान्य० व्रीहिभेदः** ( रा. १६.१०१ ) **द्र० 'व्रीहि'** तांदूळ. पहा 'व्रीहि.'

**गर्मूटी**–स्त्री., **धान्य० श्यामाकभेदः, श्यामाकसदृशा कषायमधुरवातलसंग्राह्यादिगुणा** ( चसू. २७.१८ ) ( असंसू. ७ )
सांवा प्रकार. सांव्यासारखाच तुरट, गोड, वातुळ. मलसंग्राहक आहे. सांवा–वरी.

**गर्मोटिका**–स्त्री., **वनस्पति० गुणाः–मधुरा, शीता, सारिणी, दाहहारिणी च** ( रा. परि. ८.५१ )
पाण्याच्या आश्रयाने होणारी वनस्पती. गुण–गोड, थंड, सारक, दाहनाशक.

**गर्हा**–स्त्री., **निन्दा** ( असंसू. २.१२ ) निंदा.

**गर्हित**–वि., **निन्दितमयोग्यम्** ( सुचि. २४.६२ )
निंदा झालेले. निंदिलेले.

**गल**–पु., **शारीर० अवयवविशेषः । मुखस्याभ्यन्तरे गीर्यतेऽनेन इति गलः** ( अहृसू. १२.५ )
गळा. तोंडाच्या आतला अन्न गिळणारा अवयव.

**–कीलक**–पु., **गलरोग० गले कीलवन्मांसांकुरः, चिकित्सा–'गलकीलकनुत्यर्थं विषतिन्दुसनागरम् । हरीतक्या च संयुक्तं मुखे धारय सन्ततम्'** ( र. २४.३३ )
गळ्यात खिळ्यासारखे मांसांकुर होतात तो रोग. उपचार–कुचला, सुंठ, हिरडा यांची गोळी तोंडात धरावी, रस गिळावा.

**–गण्ड**–पु., **गलरोग० विंशतिश्लेष्मविकारेष्वेकः** ( चसू. २०.१७ ) **मांसप्रदोषजविकारेष्वेकः** ( चसू. २८.१४ ) **बहिर्मार्गजो रोगः** ( सुसू. २४.९ ) **तस्य स्थानम्––षष्ठी रोहिणी नाम त्वक्** ( सुशा. ४.४ ) **'गलस्य पार्श्वे गलगण्ड एकः ।** ( चचि. १२.७९ ) **समधुररसस्यातियोगतो भवति** ( सुसू. ४२.१० (१) **सामान्यलक्षणम्–यस्य गले निबद्धः श्वयथुर्मुष्कवल्लम्बते महान्वा ह्रस्वो वा स गलगण्डः** ( सुनि ११.१२ )
**सम्प्राप्तिः–प्रकुपितः श्लेष्मा बहिस्त्वग्भागे संश्रित्य शनैर्मुष्कवत् शोफं सञ्जनयति** ( चसू. १८.२१ ) ( असंउ. २५ )
**वातः कफश्चैव गले प्रवृद्धौ मन्ये मेदश्च संसृत्य गण्डं कुरुतः** ( सुनि. ११.२२ ) **'वातकफमेदांसि पृथग्गलगण्डकारणानि तेन त्रय एव गलगण्डाः व्याधिस्वभावात्पैत्तिकस्तु न भवत्येव'** ( मधुकोमानि ) **गलगण्डभेदाः–वातजः श्लेष्मजः मे इति त्रय एव गलगण्डाः । वातज लक्षणम्–वर्णेन कृष्णारुणः कृष्णसिरावः**

**युक्तः तस्मिंश्च वृद्धे सति तालुगले शोषः विरसास्यता च** ( सुनि. ११.२३ ) ( असंउ. २५ ) **वातजगलगण्डस्यावस्थाभेदो मेदोऽन्वितो गलगण्डः। लक्षणम्–मेदोन्वित उपचितोऽतिस्निग्धतया कालेन चारुजो भवेत् । पारुष्ययुक्तश्चिरवृद्ध्यपाकः कदाचित्पाकमियात् मेदोजगलगण्डिन आस्यवैरस्यं तालुगलप्रशोषश्च भवेत्** ( सुनि. ११.२३–२४ ) **कफजलक्षणम्–स्थिरः कफसमानवर्णः शोफ उग्रकण्डूः शीतस्पर्शः चिराभिवृद्धो मन्दरुजो भवति वृद्धे सति स गले लेपं मधुरास्यतां च कुर्यात्**

( सुनि. ११.२५–२६ असंउ. २५ )

**मेदोजगलगण्डलक्षणम्–स्निग्धो मृदुः पाण्डुरनिष्टगन्धो नीरुक् अतिकण्डुरल्पमूलोऽलाबुवत्प्रलम्बते, कफजगलगण्डसमलक्षणः, देहस्य वृद्धौ मेदोजो गलगण्डो वृद्धो भवेद्देहस्य क्षये तस्य क्षयो भवति, वृद्धे सति गले शब्दं कुरुते स्वरे चाल्पतां आधत्ते**

( सुनि. ११.२६–२७ ) ( असंउ. २५ )

**असाध्यलक्षणम्–क्षीणं कृच्छ्राच्छ्वसंतं मृदुसर्वगात्रं संवत्सरातीतमरोचकार्तं भिन्नस्वरं गलगण्डिनं विवर्जयेत्** ( सुनि. ११.२८ ) **चिकित्सा–स्वेदोपनाहे विस्रावणं च गलगण्डे कुर्यात्**

( सुचि. १८.४८–५० )

**वातकफजयोर्गलगण्डयोः पाकं प्राप्तयोः पक्वव्रणशोफस्य च चिकित्सा हिता** ( सुचि. १८.५० ) **मेदोजगलगण्डरोगे स्निग्धतनोर्नरस्य ऊरुमूलसंश्रितसिरां विध्येत् । शस्त्रेणाऽऽपाट्य विदार्य मेदः समुद्धृत्य चैनं सीव्येत् । मज्जाज्यमेदोमधुभिर्दहेत् । दाहे च मधुघृताऽवचारणम् । गाढश्च बन्धः यवभोजनं च हितम्** ( १८.५२–५५ ) **गलगण्डरोगेऽन्नपानम्–'कटुत्रिकक्षौद्रयुताः समूत्रा भक्ष्या यवान्नानि रसाश्च मौद्गाः सशृङ्गवेराः सपटोलनिम्बा हिताय देयाः।'** ( सुचि. १८.५१ )

गलगंड. २० कफविकारातील एक मांस दुष्टीमुळे होणारा. बहिर्मार्गात होणारा. स्थान– ७ त्वचांपैकी ६ वी रोहिणी त्वचा. **कारण**–मधुर रसाचे अति सेवन. दोष–वात व कफ, धातु दुष्टि–मांस व मेद. प्रकार तीन–१ वातज २ कफज व ३ मेदोज. सामान्य लक्षण–गळ्याला लागून वृषणासारखी लोंबलेली सूज येते. **वातज** गलगंडलक्षणे–रंग काळसरतांबुस, त्यावर काळ्या शिरांचे जाळे, व टोचणी, तोच फार वाढल्यास टाळू व गळ्याला कोरड, आणि तोंड बेचव होणे ही लक्षणे होतात. **कफजगलगंड** लक्षणे–कफासारखा पांढरा वर्ण, घट्टपणा, सूज, अतिकंडू. स्पर्शाने थंड, पुष्कळ दिवस सावकाश वाढ, पीडा मंद स्वरूपाची व अधिक वाढल्यावर गळ्याला लेप झाल्याप्रमाणे वाटणे व तोंड गुळमट होणे ही लक्षणे होतात.

**मेदोज** गलगंड–स्पर्शाने स्निग्ध व दाबून पाहिल्यास मऊ, रंग पांढरा, नकोसा दुर्गंध, पीडा नसणे, अत्यंत खाज, मूळ लहान, भोपळ्यासारखा खाली लोंबतो. कफज गलगंडलक्षणे होतात, देहात जसा मेद तसा तोही वाढतो. मेद कमी झाल्यास कमी होतो. फार वाढल्यास गळ्यातल्या गळ्यात आवाज होतो व शब्द नीट उमटत नाही.

**असाध्य लक्षणे**–कष्टाने श्वास घेता येणे, सर्व अवयव मृदु होणे, तोंड बेचव क्षीणत्व, एकवर्षाचा जुना होणे. व आवाज फुटणे. **उपचार**–शेकणे, पोटीस, रक्तस्राव. कफवातज गलगंडात तो पिकला तर फोडावा व जखमेची चिकित्सा करावी. **मेदोजात**–मांडीच्या मुळांतली शीर तोडून रक्त काढावे. गंड कापून फोडून मेद काढून टाकावा व शिवावा. **मज्जा** तूप मेद मध यांनी गंड जाळावा; व नंतर मध तूप लावावे. **पथ्य**–जव हा मुख्य आहार. मुगाचे कढण त्यात त्रिकटु ( सुंठ, मिरी, पिंपळी ) घालून देणे. मध, पडवळ, निंब व गोमूत्र यांचा उपयोग करावा.

**–गण्डनिदान**–( परिव० )–न., अध्याय०

( सुनि. ११.१ )

अध्यायाचे नाव. यात गलगण्डाची माहिती.

**–गोडिका–स्त्री., सविषप्राणि० गलगोडी** ( चचि. २३.१५६ ) एक विषारी प्राणी.

**–गोडी–स्त्री., सविषप्राणि० गृहगोधा ज्येष्ठा गृहगोधिका, एकीयमते तु सरटः ( चक्र )** ( चचि. २३.१५६ ) '**गृहगोधिका**' पाल. सरडा.

**–गोलिका–स्त्री., सविषकीट० सा च षट्प्रकारका श्वेता–कृष्णा–रक्तराजी–रक्तमण्डला–सर्षपिका च। ताभिर्दष्टे सर्षपिकावर्ज्यलक्षणम्–दाहशोफक्लेदा भवन्ति। सर्षपिकादष्टलक्षणम्–सर्षपिकया हृदयपीडाऽतिसारश्च भवति। एतासु सर्वासु सर्षपिका प्राणहारी** ( सुक. ८.२९ ) **तद्दष्टेऽगदः–रजन्यागारधूमः वक्रं कुष्टं बीजं पलाशजम्। अगदः विषनाशनः**

( सुक. ८.४८ )

विषारी किडा–सहा प्रकार. दाह, सूज, व्रणातून सारखा स्राव, सर्षपिका, हृदयपीडा व अतिसार.
**हिला मारक औषध**–हळद, घेरोसा, तगर, कोष्ठ, पळसाचे बी.

**–गोली**–स्त्री., **सर्प० सा निर्विषा** ( सुक. ४.३४. (४) एक निर्विष सर्प.

**–ग्रन्थि**–पु., **गलरोग० गले ग्रन्थिः** ( र. २४.१३१ ) **तत्र पारदविमलादिलेपः कार्यः** ( र. २४.५५ ) पारा, विमल इ० लेप करावा.

**–ग्रह**–पु., **गलरोग० सोऽन्तर्गले भवति, शोफप्रधान आशुकारी रोगः, सम्प्राप्तिर्लक्षणं च**–' **यस्य प्रकुपितः श्लेष्मा स्थिरः सन् अन्तर्गले तिष्ठति, आशु च संजनयेच्छोफं, तस्य गलग्रहो जायते** ( चसू. १८.२२ ) **अयं शिरोविरेचनार्हः** ( चसि. २.२२ ) **किंचाऽयं स्वेद्यः** ( चसू. १४.२० ) **धूमपानशम्यः न तु शम्यः शमनीय इत्यर्थः** ( चसू. ५.२८ ) **बालस्य गलग्रहे लक्षणम्–ज्वरारुचिमुखस्रावाः** ( कासू. २५.११ )
गळ्याचा रोग. गळा मिळून येणे. गळ्यात सूज येते. कफ ही सूज करतो. बालकाला होतो तेव्हा ताप, तोंडातून स्राव व चव नसणे, थुंकी. **उपचार**–शेकणे, औषधी विड्या पिणे, व नाकात औषध घालून कफाचा स्राव ( रेचन ) करणे.
**लक्षण० गलमार्गोऽवरोधः** ( चचि. ४.२६ )
गळा मिळून येणे, गिळता न येणे.

**–पाक**–पु., **रोग० चत्वारिंशत्पित्तविकारेष्वेकः, गलपक्वता**( चसू २०.१४ चइ. ११.१५ )
गळा पिकणे, गळा येणे. चाळीस पित्तरोगांपैकी एक.

**–रोग**–पु., **गले ये रोगा भवन्ति, ते गलामया गलरोगा वा, कण्ठरोगाः** ( सुनि. १६.४६ ) **गलेऽष्टादशामयाः भवन्ति** ( अहृउ. २१. ६४–६६ )
**गलरोगनामानि**—' **कण्ठगतास्तु रोहिण्यः पञ्च, कण्ठशालूकम्, अधिजिह्वो वलयो, बलासः ( अलासः ) एकवृन्दः, वृन्दः, शतघ्नी, गिलायुः, गलविद्रधिः, गलौघः, स्वरघ्नः, मांसतानो विदारी चेति** ( सुनि १६.४६ ) ( **गयी,= गलामयः** ) ( चसू. २६.१०२ )
गळ्यात होणारा कोणताही रोग. ते अठरा आहेत.

**–लेप**–पु., **लक्षण० गले श्लेष्मणः प्रसक्तिः आवरणं च** ( सुउ. ५२.७ )
गळ्यात लपेटलेल्या सारखे वाटणे. कफ साठतो. त्याचे आवरण असते.

**–विद्रधि**–पु., **गलरोग० विद्रधेः सदृशः सर्वगलव्याप्तः शोथविशेषः । शीघ्रजन्मा स च स्थानप्रभावेण सन्निपातज एव** ( मधुकोश. मानि. ) **लक्षणम्—महारुजो दुर्गन्धयुक्तपूयसदृशमलस्रावी शोफः** ( सुनि. १६.५९ असंउ. २५ )
**चिकित्सा–अमर्मस्थितं सुपक्वं गलविद्रधिं शस्त्रेण भेदयेत्** ( सुचि. २२.६७ )
गळ्याचे गळू. हा सर्व दोषज. यात फार वेदना. सुजेतून दुर्गंधी पुवासारखा स्राव होत असतो. मर्मस्थानी नसल्यास शस्त्रचिकित्सा.

**–शालूक**–पु., न., **गलरोग० कण्ठशालूकः** ( सुनि १६.५१ ) **मांसप्रदोषजरोगेष्वेकः** ( चसू. २८.१४ ) **सम्प्राप्तिर्लक्षणं च–नेकफसम्भवः पिशिताङ्कुराचितः ग्रन्थिर्गले कण्टकशूकभूतः खरः स्थिरो भवति** ( सुनि. १६.५१ ) **याप्योऽयं रोगः** ( सुसू. २३.८ ) **चिकित्सा–शस्त्रसाध्योऽयम्, विस्राव्य कण्ठशालूकं शोधनादीनाचरेत्** ( सुचि. २२. ६४–६६ )
मांसाचे अंकुर असलेली गाठ. हे काटे, कुसळासारखे टोचतात. शस्त्रक्रिया, रक्तस्राव, रेचक व कफवात नाशक औषधे.

**–शुण्डिका**–स्त्री., **शारीर०**
**तालुमूलस्थः** ( चसि. २.२२ )
**षट्पञ्चाशत्प्रत्यङ्गेष्वेकम्** ( चशा. ७.११ )
पडजीभ. ५६ प्रत्यंगापैकी एक.
**गलरोग०**
**तालुमूलस्थगलशुंड्यवयवस्य शोथवृद्धियुक्तो रोगः** ( सुनि. १६.४० )
**मांसदोषजोऽयं विकारः** ( सुसू. २४.९ )
**सम्प्राप्तिः–तालुमूले अयं कफाद्रक्तान्विताद्भवति । प्रकुपितः श्लेष्मा काकले व्यवतिष्ठते शोफं च आशु सञ्जनयति सा गलशुण्डिका** ( चसू. १८.२० )
**लक्षणम्–मत्स्यबस्तिसदृशो मृदुर्दीर्घः प्रलम्बः पिच्छिलः शोफो भवति, तृष्णाकासश्वासकृद्भवति, नासयाऽऽहारं प्रेरयन्कण्ठोपरोधवमिकृद्भवति** ( सुनि., १६.४१ ) ( असंउ. २५ )
**चिकित्सा–छेद्यरोगोऽयम्** (सुसू. २५.३–५) **गलशुण्डिकामङ्गुष्ठाङ्गुलिसन्दंशेनाऽऽकृष्य मण्डलाग्रेण शस्त्रेण च्छेदयेत् गलशुण्डिकां त्रिभागं च्छेदयेदर्धं वा । नोत्कृष्टं न हीनं च । अतिच्छेदनादतिशोणित-**

**स्रावो भवति कदाचिच्छोणितस्रावाद् रोगी पञ्चत्वमप्याप्नुयात् । अल्पमात्रच्छेदनाल्लालास्रावः शोथो निद्रा भ्रमस्तमो भवेत्**

( सुचि. २२.४९-५६ )

**संप्राप्ति**–घशात तालुमुळाशी कफ व रक्त दुष्टीमुळे प्रकुपित कफ मांस दुष्टी करुन पडजिभेला सूज उत्पन्न करतो. ती गलशुंडिका, पडजीभ लांबणे, सुजणे. मांस दुष्टीमुळे, कफरक्तदुष्टीने मांस-दुष्टिलक्षणे–मत्स्याच्या बस्तीसारखी मऊ, लांब, लोंबती, बुळबुळीत सूज असते. तहान, खोकला, श्वास, गिळण्याला त्रास, वांती. **चिकित्सा** चिमट्याने ओढून मंडलाग्राने एक तृतीयांश किंवा निम्मे कापावी. कमी जास्त कापू नये. जास्त कापली तर अति रक्तस्राव होऊन अखेर मरण. थोडी कापली तर लाळ गळणे, सूज वाढणे, भ्रम, अंधेरी, झोप असे उपद्रव होतात.

**–शुण्डी**–स्त्री., गलरोग० **गलशुण्डिका कण्ठशुण्डी** ( चसू. ५.३०; सुनि. १६.४१ )
पडजीभ लांबणे–सुजणे पहा 'गलशुण्डिका.'

**–शोफ**–पु., लक्षण० **शोफोऽयं उदानवायुगतिरोधकः अन्नजलाऽवरोधी च** ( सुनि. १६.६० )
गळ्याची सूज. अन्न-पाणी गिळता न येणे.

**–शोष**–पु.,– लक्षण० **कण्ठशोषः** ( चनि, ३.९ )
गळा सुकणे.

**–स्तम्भ**–पु., लक्षण० **गलग्रहः** ( सुउ.५५.११ )
गळा जखडणे, धरणे.

**–स्रोतस्**–न., शारीर० **मुखान्तर्गतः गलमार्गः**

( अहसू. २६.१५ )

गळा, गिळण्याचा मार्ग, अन्ननलिका व तोंड यांचा संधि.

**गलत्कुष्ठ**–न., रोग० **काकणाख्यं महाकुष्ठम् लक्षणम्– 'पादयोः श्वयथुस्तोदो गलन्त्यङ्गुलयो यदि । नासिकास्वरयोर्भङ्गो गलत्कुष्ठस्य लक्षणम्'**

( र. १०.७ )

महारोग. काकणक महाकुष्ठ. पायावर सूज, टोचणी अंगुल्या गळतात. नाक तुटते. स्वर फुटतो.

**गलन्ती**–स्त्री., पात्र० **स्रवन्ती, यथा–गलन्ती नाडी अनवरतं धारया जलादि स्रवन्ती दृश्यते वारिधारिका संज्ञां प्राप्ता । वंशादिमयी समालोक्यते** ( अरु. ) **यथा–गलन्ती कुम्भी, सच्छिद्रा घटिका**

( हे अहसू. १७.१० )

गळती, झारी, अभिषेक पात्र, सच्छिद्र घटिकापात्र, ज्यातून पाणी सारखे गळू शकते.

**गलामय**–पु., **गलरोगः कण्ठरोगः** ( चसू. २६.१०२ ) ( सुचि. २४.२३ ) गळ्याचा रोग.

**गलार्बुद**–न., **गलरोग० कण्ठगतोऽयं व्याधिः, सम्प्राप्ति-लक्षणं च––वातादयो मला जिह्वाया अवसाने कण्ठस्य प्रारम्भे वा पाकरहितं स्थिरं लोहितमरुजं च शोफं जनयन्ति स शोफो गलार्बुदमित्युच्यते**

( असंउ. २५; सुचि. २२.८१ )

गळ्याचे अवाळू. तिन्ही दोष जिभेच्या शेवटी किंवा गळ्याच्या आरंभी स्थिर, न पिकणारी, लाल सूज उत्पन्न करतात.

**गलौघ**–पु., **गलरोग० कफरक्तजोऽयं तीव्रज्वरयुक्तः शोथप्रधानो गलरोगः** ( सुनि. १६.६० ) **लक्षणम्– कण्ठे घोरः श्वयथुर्भवति स गलमार्गेऽर्गल इव जायते, प्राणानिलान्नजलरोधकः, शिरोजाड्यतन्द्रा-लालाप्रसेकादीन्करोति** ( असंउ. २५ ) **श्वसितमपि निरुध्यते** ( असंउ. २६ ) **चिकित्सा–गलौघोऽसाध्यः कीर्तितः । प्रत्याख्याय समुपाचरितव्यः**

( सुचि. २२.८०-८१ )

**द्रुतं तेषु क्रिया कार्या** ( असंउ. २६ )

गळ्याचा रोग. गळ्यात अडसराप्रमाणे भयंकर सूज. अतिशय ताप, अन्न, पाणी, श्वास सुद्धा घेता येत नाही, लाळ गळते, डोळ्यांवर झापड, डोके जड, कफ रक्तदुष्टीने होतो. असाध्य.

**गलोड्य**–न., वनस्पति० **पद्मबीजम्, पित्तप्रबले वातरक्ते उपयुक्तम्** ( सुचि. ५.८ )
कमळबीज. पित्तज वातरक्तात उपयोगी.

**गल्ल**–पु., रत्न० ( असंचि. ६ )
रत्न, पद्मराग. इंद्रनील, बिलोरी कांच.

**गल्लिर**–पु., कर्णरोग० **उन्मन्थः, 'उन्मन्थो गल्लिरश्च सः** ( असंउ. २१ ) कानाचा रोग.

**गवय**–पु., पशु० **कूलचरः गोसदृशः, सास्नाककुदरहितः** ( अहसू. ६.५१ ) **गलकम्बलशून्यः आनूपपशुः**

( चसू. २७.३९ )

म. गवा; बं. गवय; हिं. वनगौ. )

**अस्य मांसगुणाः–मधुरं मधुरपाकं स्निग्धं कास-जिच्छुक्रलं च** ( सुसू.४६.९७ ) ( धपरि. ६.३५ )

( असंसू. ८ )

गाईसारखा पण वशिंड व गळ्याची पोळी नसलेला प्राणी, गवा, वनगाय. **मांसगुण**–गोड, पचल्या-

नंतर गोड, स्निग्ध, शुक्र वाढविणारे खोकला कमी करणारे.

**गवयोद्भव**–न., वनस्पति० **तवक्षीरम्** ( रा. ६.८८ ) तवकीर.

**गवल**–वि., **माहिषम्, गवलं माहिषशृंगम्** ( इंदु. असंसू. ८.९६ ) रेडा, रेड्याचे शिंग.

**गवाक्षित**–वि., **सच्छिद्रम्** ( सुशा. ५.१२ ) **विरचित-निरन्तरजालकाकाररन्ध्रनिकरपरिकलितम्** (ड.सुशा. ५.१२ ) **जालकैरिव व्याप्तम्, गवामक्षीव इति गवाक्षः, गवाक्षा जालकानि अस्य सञ्जातानि इति गवाक्षितम्** ( सुशा. ९.९ ) **'सिराभिरिदं शरीरं गवाक्षितं पिनद्धमाततं च** ( असंशा. ५ ) भोकाचे, छिद्रयुक्त; अनेक छिद्रांनी युक्त जाळे. जाळ्यासारखे व्यापलेले. हे शरीर सिरांनी जाळ्यासारखे विपुल छिद्रांनी युक्त, झाकून व्यापलेले आहे.

**गवाक्षी**–स्त्री., वनस्पति० **मल्लिका** ( ध. ५.१३४ ) मोगरी.

**शाखोटः** ( रापरि. ९.३० ) भूर्जपत्र असेही म्हणतात. साग, हेदी.

**इन्द्रवारुणी** ( र. २१.५५–५८ ) ( अहृसू. १५.४ ) ( असंसू. १६ ) कवंडळ, इंद्रावण.

**गवादनी**–स्त्री.,वनस्पति० **इन्द्रवारुणी** ( ध. १.२४८ ) ( असंउ. १० ) कवंडळ, इंद्रावण.

**गिरिकर्णी** ( ध. ४.८५ ) ( असंउ. २ ) गोकर्णी.

**गवाम्प्रिय**–पु., धान्य० **श्यामाकः** ( ध. ६.८८ ) सांवा, वऱ्याचे तांदूळ.

**गवेधुक**–पु., सर्प० **दर्वीकरः** ( सुक. ४.३४(१) नाग.

–पु.,–न., तृणधान्य० ( चसू. २.२५ ) ( अहृसू. २.१० ) **'गरल इति लोके'** ( सुसू. ४६.२१ ड.) ( असंउ. ४२ ) **शूकधान्यमिदम्, श्यामाकसदृशोऽयम्, ग्राम्याऽरण्यभेदेन द्विविधः, घुलुञ्चः, गुणाः–कषायो मधुरो लघुः शीतः कफपित्तघ्नो वातकरः** ( चसू. २७.१७ ) वऱ्याच्या तांदुळासारखे गवती धान्य. प्रकार दोन– ( १ ) रानातले ( २ ) गावातले. **गुण**–तुरट, गोड, हलके, थंड, कफपित्तनाशक, वातकर.

न.,–खनिज० **गैरिकम्** ( ध. ३.१६७ ) गेरू.

**गवेधुका**–स्त्री., धान्य० **गुणाः–कटुः शीतला पित्तनाशनी दन्तविषार्तिजित्** ( ध. ६.१८१; असंसू. ७ )

हिं.—गरहेडुआ.
म.—**कसरु.**
गु.—थेगी.
बं.—गडगडे.
त.—काट्टुकोतुमै.

कसरु; गोजिव्हा. हे तिखट, थंड, पित्तनाशक, दातातील दुःख व विषनाशक.

**गवेधुकान्न**–न., **गवेधुक–क्षुद्रधान्यस्य सिद्धमन्नम्, तच्च कर्शनीयानां श्रेष्ठम्** ( चसू. २५.४०; असंसू. १३ ) कसरु. हलक्या धान्याचे. शिजवलेले अन्न हे कृश करणाऱ्या सर्व अन्नात श्रेष्ठ.

**गवेषण**–न., **अन्वेषणम्** ( सुउ. ६५.४२ ) अन्वेषण, नवा शोध लावणे.

**गव्य**–वि., **गोरिदम्, गोसम्बन्धि. दुग्धदधिघृतमूत्र-शकृन्मांसरसादि** ( चसू. १३.८३ ) गाईचे, गाईसंबंधी. दूध, दही, तूप, मूत्र, मळ, मांसरस इत्यादी.

**( गव्या )**–स्त्री., भैषज्य० **गोरोचना, गोपित्तादिसम्बन्धादियं गव्या इति सुष्ठु संज्ञिता** ( रा. १२.३४ ) गोरोचन.

**–पिशित**–न., **गोमांसम्, रक्तपित्तहेतुः** ( चनि. २.४ ) गाईचे मांस.

**–रस**–पु., **गोमांसरसः** ( चसू. १३.८३ ) गाईच्या मांसाचा रस.

**गह्वर**–न., वनस्पति० **इन्द्रयवः** ( ध. २.१५ ) इंद्रजव.

**( गह्वरा )**–स्त्री., वनस्पति० **विडङ्गम्** ( रा. ६.१६ ) वावडिंग.

**गाङ्ग**–वि., **आन्तरिक्षजलभेदः** ( सुसू. ४५.७ ) **द्र० 'जल'** आकाशातील पावसाचे पाण्याचा एक प्रकार.

**गाङ्गेय**–पु., न., वनस्पति० **मुस्ता** ( ध. १.४० ) ( सुउ. १७.१८ ) नागरमोथा.

खनिज० **सुवर्णम्** ( रा. १३.१ ) सोने.

**( गाङ्गेयी )**–स्त्री., वनस्पति० **मुस्ता** ( असंउ. ४४ ) नागरमोथा.

**गाङ्गेरु**–पु., वनस्पति० **नागबला** ( असंसू. ७ ) एक चिकणा.

**गाङ्गेरुक**–स्त्री., **नागबलाफलम्** ( चसू. २७.१४२ ) चिकणा बी, बलबीज.

**गाङ्गेरुकी**–स्त्री., वनस्पति० **बलाभेदः, नागबला** ( ध. १.२८४ ) **द्र० 'बला'** चिकणा प्रकार, पहा 'बला.'

**गाढलवण**–न., लवण० गडलवणम् ( रा. ६.४७ )
एक मीठ. जमिनीतून निघणारे मीठ.

**गाढवर्चस्**–वि., रोग० गाढविट्कः ( चसू. १३.३२ )
घट्ट मळ, गाठाळ मळ, कडक लेंडी.

**गाढोच्छादन**–न., उच्छादनं, गाढं निबिडं घनं वा घर्षणम् ( असंनि. १ ) घर्षण. जोरात घासणे.

**गाण्डीर**–न., शाक० गण्डीरम्, स्थलजजलजत्वाद्द्विविधम्, गुणाः–विदाहि रूक्षं तीक्ष्णोष्णं बद्धविण्मूत्रं त्रिदोषकरं च ( चसू. २७.१७१ )
एक भाजी. दोन प्रकार. १ जमिनीवरची २ पाण्यातली. **गुण**–आंबट, जळजळ करणारी, रूक्ष; उष्ण, तीक्ष्ण, लघ्वी व मळ अवरोधक, त्रिदोषकारी.

**गाण्डीविन्**–पु., वनस्पति० अर्जुनः ( रा. ९.१९१ )
अर्जुनसादडा.

**गात्र**–वि., स्थूलम् अत्र गात्रपदं न मूलतः स्थूलार्थकम्, परं गात्रवत्त्वेन लक्षणया स्थौल्यपरम् ( र. ४.१० )
स्थूल. येथे हा अर्थ लक्षणेने आहे.
**शरीरावयवः** ( सुशा. १०.४६ ) शरीराचा अवयव.

**–पारुष्य**–न., लक्षण० गात्रकाठिन्यम् ( चसू. १७.५६ )
अवयवांचा कठिणपणा, रखरखीतपणा, खरखरीतपणा.

**–भञ्जन**–न., लक्षण० गात्रेषु भङ्गवत् पीडा ( चचि. २८.२५ )
अवयव फुटल्याप्रमाणे वेदना, फूट.

**–वादित्र**–न., गात्रमेव वादित्रम्, गात्रमेव वाद्यभाण्डम् ( सुचि. २४.९५ ड. )
अवयववाद्य. वाद्याचे साधन; शीळ घालणारे तोंड, टाळी वाजवणारे हात, वाद्य–साधन वाद्यभांडे.
**विक्षेप**–पु., रोग० हस्तादेरितस्ततो विक्षेपः ( चचि. ३.७८ )
हातपाय आपटणे, त्यांचे आकुंचन प्रसरण करणे, आचके.

**–विश्लेष**–पु., विघटनम् ( सुसू. १२.१६ )
अवयव निखळणे.

**–वेष्टन**–न., पीडाविशेषः ( चसि. ७.४९ )
अवयव वेढल्याप्रमाणे, आवळल्याप्रमाणे पीडा.

**–शूल**–पु., लक्षण० गात्रवेदना ( चक. ७.४४ )
अवयवात शूळ, वेदना.

**–संस्पर्श**–पु., अवयवसंस्पर्शः ( सुनि. ५.३३.३४ )
अवयव यांचा एकमेकांचा एकमेकांशी स्पर्श होणे.

**–सदन**–न., लक्षण० अङ्गग्लानिः ( सुचि. ३५.२३ )
अवयव गळाल्यासारखे वाटणे. गळाठा.

**–साद**–पु., लक्षण० अङ्गग्लानिः ( सुउ. ३९.१६४ )
पहा ‘ गात्रसदन ’.

**–सुप्तता**–स्त्री., रोग० गात्रस्य स्पर्शज्ञानाभावः ( चचि. २८.२२ )
अवयवांना स्पर्श न कळणे. सुनबहिरे.

**–स्फुरण**–न., लक्षण० गात्राणां स्पन्दनं कम्पो वा ( चचि. २८.२५ )
अवयवात स्फुरण–कंप होणे. थरथर–थडथड होणे.

**गात्रायाम**–पु., लक्षण०वातरोगः, अवयवस्य आयामः ( असंसू. ११ )
अवयव ताणणे, तणावा, ताठ करणे.

**गाथा**–स्त्री., धर्मादिसम्बन्धी श्लोकः, गीयते इति गाथा ( चसू. १५.७ )
( तुकारामाची ) गाथा. परमेश्वर, धर्म, कर्म, कर्तव्य इत्यादी संबंधी केलेली पद्ये.

**गान्धर्व**–वि., गान्धर्वसत्त्वम्, शुद्धसत्त्वस्य प्रकारः ( चशा. ४.३७(७)
सात्विक प्रकृतीचा एक प्रकार. गंधर्वासारखे मनचित्तवृत्ति असणारा.

**–काय**–( परिव० ) पु., सात्त्विककायविशेषः यस्मिन्नरे गन्धमाल्यप्रियता नृत्यवादित्रकामिता विहारशीलता च दृश्यते, स गन्धर्वकायः ( सुशा. ४.८५ )
गंधर्वाच्या चित्तवृत्तीप्रमाणे असणारा. सात्विक प्रकृतीचा प्रकार. ज्याला सुगंधी द्रव्ये, फुले, नाच, वाद्ये आवडतात. खेळ आवडतात तो.

**–चित्त**–वि., गीतादिनिरतः ( सुशा. ४.६४ )
गायनवादनात नित्य रमणारा.

**–शब्द**–पु., गीतम् ( चसि. ६.५८ ) गाणे.

**गान्धारी**–स्त्री., वनस्पति० यासः ( रा. ३.२६ )
धमासा.
**कण्टकारी** ( र. १६.११–१५ ) रिंगणी.

**गाम्भीर्य**–न., गम्भीरस्थानाश्रितत्वम्, कृतास्पदत्वम् ( चचि. २८.७४ )
गंभीरपणा. खोल भागात(अंतर्गत) होणे, घर करणे.

**गायत्र**–पु., वनस्पति० सोमभेदः ( सुचि. २९.७ )
सोम या महौषधीचा प्रकार.

**( गायत्री )**–स्त्री., वनस्पति० खदिरः ( ध. १.२५ ) खैर.
**देवता०** देवताविशेषाधिष्ठितस्त्रिपदात्मको द्विजो-

**च्चार्यो वैदिको मन्त्रविशेषः** ( सुसू. २९.७२ )
गायत्रीमंत्राची देवता. गायत्रीमंत्र.

**गार**–पु., **तडागमृत्तिका, जले चिरशीर्णा वा मृत्तिका** ( र. १०.१३–१४ )
तलावातील–पाण्यातील दीर्घकाल असलेली माती–चिखल–गारा.

–**कोष्ठी**–स्त्री., **शोधितलौहादिभस्मकारकः मृण्मय-कोशविशेषः** ( र. १०.४४–४८ )
शुद्ध धातूचे भस्म बनविण्याकरिता केलेली मातीची भट्टी, कोठी.

–**मूषा**–स्त्री., **मूषा० षड्गुणदग्धगारो लोहकिट्टं शणं कृष्णमृत्तिका कोकिलभस्मेत्येतेषां मिश्रणान्निर्मिता मूषा** ( र. १०.१५ )
मूस. जाळलेला जुना चिखल ६ भाग व मंडूर, सण, काळी माती, कोळसा यांच्या मिश्रणाने केलेली मूस.

**गारुड**–न., **खनिज० गारुत्मतम्** ( ध. ६.४९ )
मरकत, पाचू.
**अञ्जन** ( असंउ. ४२ ) सुरमा.

**( गारुडी )**–स्त्री., **वनस्पति० वत्सादनी** ( रा. परि. ३.३२ )
लांब व बळकट कांडी असलेली विषनाशक पौष्टिक वेल.

**गारुत्मत**–न., **मणि० मरकतः** ( ध. ६.४९ ) पाचु.

–**पत्रिका**–स्त्री., **वनस्पति० पाची** ( रा. परि. १०.४६ )
हिरवी व हिरव्या पानांची सुगंधी वेल.

**गार्ग्य**–पु., **ऋषि० ( चसू. १.१० ) जन्मप्रभृतिबालानां बस्तिकर्मोपकल्प्यमित्ययमूचिवान्** ( कासि. १.११ )
मुलांना जन्मापासून बस्ति द्यावा असे प्रतिपादन करणारा ऋषि.

**गालन**–न., **वस्त्रेण मलनिरासपूर्वकं सारभागोद्धरणम्** ( सुसू. ४४.६० )
कपड्याने गाळणे, वस्त्रगाळ करून सार भागाचे ग्रहण करणे.

**गालव**–पु., **ऋषि० हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः** ( चसू. १.१० )
हिमालयाच्या उतरणीवर जमलेल्या ऋषींमधील एक.
**कन्दविषः** ( असंउ. ४० ) विषारी कंद.

**गाला**–स्त्री., **वनस्पति० मदनफलम्** ( असंचि. १ )
गेळफळ.

**गालोड्य**–न., **वनस्पति० पद्मबीजम्** ( ध. ४.१५९ )
कमळबीज, कमळाचे बी.

**गिरि**–पु., **पर्वतः** ( असंउ. २ ) पर्वत.

–**कदम्बक**–पु., **भूकदम्बकः** ( असंउ. २ )
मोठी मुंडी, ओवा.

–**कदली**–स्त्री., **वनस्पति० गुणाः–मधुरा, शीता, गुर्वी रुच्या, बल्या, वीर्यकरी, पित्तघ्नी, तृष्णादाह-शोषघ्नी च** ( रा. ११.११२ )
हिं.—केला.
म.—**केळे**; बीयुक्त केळे, रानकेळ.
गु.—केळुं.
बं.—कला.
त.—वाळे.
बी युक्त केळे, रानकेळ. गुण–गोड, थंड, जड, रुचकर, बलकर, वीर्यवर्धक, पित्त, दाह, तहान, शोष यांचा नाश करते.

–**कर्णिका**–स्त्री., **वनस्पति० गिरिकर्णी** ( रा. ३.१२५ )
विष्णुक्रांता, मालकांगोणी, गोकर्णी.
**गिरिकदम्बः** ( असंउ. ४२ )
मोठी मुंडी, ओवा.

–**कर्णी**–स्त्री., **वनस्पति० गुणाः–तिक्ता शीता चक्षुष्या त्रिदोषघ्नी विषदोषनेत्रविकारकुष्ठनाशिनी च** ( ध. ४.८५ )
हिं.—सफेद कोयल.
म.—**श्वेत गोकर्णी.**
ग.—धोळी गरणी.
बं.—हापरमाली.
गोकर्णी. ( पांढरी ) गुण–कडु, थंड, डोळयांना हितकर, त्रिदोषनाशक, विष, नेत्रविकार व कुष्ठनाशक.

–**ज**–पु., **वनस्पति० कोविदारः** ( रा. १०.२९४ )
कांचनार.
न.,–**खनिज० शिलाजतु** ( चचि. ३०.१४८ )
शिलाजतु.
**गैरिकम्** ( रा. १३.२३१ ) सोनकाव, गेरू.

( –**जा** ) **पाषाणभेदः** ( रा. ५.२१६ ) पाषाणभेद.
**गोधूमः** ( ध. ६.९७ ) गहू.
**मल्लिका** ( रा. १०.२२५ ) रानमोगरी.
**गिरीकदली** ( रा. ११.११२ ) रानकेळ.
**कारी** ( रापरि. ८.२६ )
कडु पानाची रानवेल. प्रकार दोन-एक काटेरी.

–**जानन्दिकेश**–पु., **श्रीशङ्करः** ( रा. १८.२१६ )
श्री महादेव,

**–जानुजा**–स्त्री., वनस्पति० त्रायमाणा ( ध.१.२५४ )
त्रायमाण.

**–धातु**–पु., खनिज० गैरिकम् ( रा. १३.२३१ )
गेरू, काव.

**–निम्ब**–पु., वनस्पति० कैडर्यनिम्बः ( रा. ९.४८ )
वारूळ. फार मोठ्या पानांचा व दांडीचा मोठा वृक्ष.

**–पीलु**–न., वनस्पति० परूषकम् ( रा. ११.८४ )
फालसा.

**–पुष्पक**–न., वनस्पति० शैलेयम् ( रा. १२.१३१ )
दगडफूल.

**–भू**–स्त्री., वनस्पति० पाषाणभेदः ( रा. ५.२१५ )
पाषाणभेद.

**–मल्लिका**–स्त्री., वनस्पति० कुटजः ( ध. २.१३ )
कुडा.

**–मृद्भव**–न., खनिज० गैरिकम् ( रा. १३.२३१ )
गेरू, काव.

**–रम्भा**–स्त्री., वनस्पति० गिरीकदली ( रा. ११.११२ )
रानकेळ.

**–वर्तक**–पु., पक्षि० वर्तिकाभेदः ( चसू. २७.४९ )
रानचिमणा.

**–( वर्तिका )**–स्त्री., पक्षि० वर्तकः ( अहसू. ६.४५ )
रानचिमणी.

**–वासिन्**–पु., वनस्पति० हस्तिकन्दः ( रा. परि. ७.३६ )
या नावाचा फार मोठा कंद.

**–शा**–स्त्री., प्रतुदपक्षि० गिरिवर्तिका ( सुसू. ४६.६७ )
रानचिमणी.

**–संभव**–पु., खनिज० शिलाजतु ( र. २.१२४ )
शिलाजित.

**–सर्प**–पु., सर्प० दर्वीकरः ( सुक. ४.३४ ( १ )
नाग.

**–सार**–पु., खनिज० लोहम् ( चचि. १ ( २ ) ५.६ )
लोखंड.

**–सिन्दूर**–पु., साधारणरसेष्वेकः ( र. ३.१३४–१३५ )
हिंगूळ. साधारण रसातील एक.
**सिन्दूरः** ( ध. ३.१०३ ) **'महागिरिषु चाल्पीयान् पाषाणान्तःस्थितो रसः । शुष्कः शोणः स विज्ञेयो गिरिसिन्दूरसंज्ञकः'**
मोठ्या पर्वतात पाषाणात असलेला सुकलेला तांबडा पारा. हिंगूळ.

**–ह्वा**–स्त्री., वनस्पति० १ ) श्वेतस्यन्दः २ ) गिरिकर्णी ( सुचि. १८.३४ )
( १ ) पांढरा स्राव होणारी वनस्पती.
( २ ) गोकर्णी.

**गिरिण्ड**–न., शुष्कं छगणम् ( र. ७.१८ ) शोणी.

**गिरिण्डक**–न., गिरिण्डम् ( र. २.१२२ ) शोणी.

**( गिरिण्डिका )**–स्त्री., काचकूपी ( र. ७.२० )
काचेची कुपी–शिशी.

**गिलायु**–पु., रोग० गलरोगः, लक्षणम्–**गले कफरक्तजः आमलकास्थिमात्रः स्थिरोऽल्परुक्ग्रन्थिर्भवति, तेन अन्नं लग्नमिव संलक्ष्यते** ( सुनि १६.५८ ) **कृच्छ्रोच्छ्वासः कृच्छ्राभ्यवहृतिश्च** ( असंउ. २५ ) **अयं शस्त्रसाध्यः,** ( सुचि. २२.६६ ) **विशेषतो भेद्यश्च** ( सुसू. २५.५–८ )
गळयाचा रोग. लक्षण–कफरक्तदुष्टीमुळे आवळ्याच्या आठळी एवढी स्थिर, थोडी वेदना असलेली गाठ होते. तिच्यामुळे घशात अडकल्या–लागल्यासारखे भासते. गिळण्यास व श्वासोच्छ्वासास त्रास होतो. शस्त्रसाध्य वा भेद्य रोग.

**गिलायुक**–पु., रोग० गिलायुः ( असंउ. २५ )
पहा ' गिलायु. '

**गिलोड्य**–वनस्पति० **कन्दोऽयं प्रावृड्जापः शणपत्राकारः वल्लीयुक्तः चर्मण्वतीनदीभवश्वेतवर्तुलपाषाणसदृशः** ( सुचि. ११.१० ) **मधुरवर्गे एकः** ( सुसू. ४२.११ )
मधुरवर्गातील एक वनस्पती. पावसाळ्यात सणाच्या पानासारखी वेल–नदीच्या काठी होते. हिचा पांढऱ्या गोल पाषाणासारखा कंद असतो.

**गीर्लता**–स्त्री., वनस्पति० तेजोवती ( रा. ३. ३९३ )
पारव्याच्या पायासारखी दिसणारी पिवळी, पिवळे तेल असलेली बुद्धिवर्धक वनस्पती.

**गीर्वाणकुसुम**–न., वनस्पति० लवङ्गम् ( रा. १२.८५ ) लवंग.

**गुग्गुलु**–पु., निर्यास० गुणाः–**कटुस्तिक्तः कषाय उष्णः पिच्छिलो लघुः सूक्ष्मो रूक्षो वर्ण्यः स्वर्यो रसायनः कफवातघ्नो बस्तिरोगमेदोरोगव्रणमेहशोफकृमिवातोदरप्लीहार्शोभूतविकारादिनाशनः** ( ध. ३.१२७ ) **सुगन्धिः तीक्ष्णः कटुपाकः सरो हृद्यः स्निग्धश्च स नवो बृंहणो वृष्यः पुराणस्त्वपकर्षणस्तैक्ष्ण्यात्कफवातघ्नः सरत्वात् मलपित्तनुत्, सौगन्ध्यात् पूतिकोष्ठघ्नः, सौक्ष्म्याच्चानलदीपनः**

गुल्मोदावर्तभगन्दरकण्डूरुचिश्वित्रार्बुदग्रन्थ्याढ्यः वातकुष्ठकोष्ठसन्ध्यस्थिगवायुघ्नः ( सुचि. ५.४०–४५ ) अग्र्यसंग्रहेष्वेकं द्रव्यम्, वृष्यवातहराणां श्रेष्ठः ( असंसू. १३ ) व्रणधूपनद्रव्येष्वेकः ( सुसू. ५.१८ ) स्थौल्यनाशनः ( सुसू. १५. ३२ ) अभ्यवहारतो विशदः स्वादुरपचीघ्नः ( असंसू. १२ ) पक्वशोथप्रभेदनार्थमुपयुक्तः ( चचि. २५.५३ ) अयं योगवाही सर्वर्तुयोग्यो जरापाप्ममलामयघ्नोऽग्निमेधास्मृतिपाटवकृच्च गुग्गुल्वतिसेवनजा व्याधयः–तिमिरवदनशोष–क्लीबता–कार्श्य–मेह–शमल–शैथिल्य–देहरूक्षत्वादयश्च ( असंउ. ४९ ) पित्तकृत्, भग्नसन्धानकृदाम-वातघ्नश्च, 'माधुर्याच्छमयेद्वातं कषायत्वाच्च पित्तहा । तिक्तत्वात्कफजित्तेन गुग्गुलुः सर्वदोषहा'
( भाप्रमिश्रप्र. ६.३८–४१ )

अयं पञ्चविधो–महिषाक्षो, महानीलः कुमुदः पद्मो हिरण्यश्च ( भाप्रमिश्र. ६.३३ )

हिं.—गूगल, गुगर.

म.—**गुग्गुळ.**

गु.—गुग्गुलु मुकुल.

त.—मैचाक्षि.

फा.—वोएजहुदान.

**गुग्गुळ. झाडाचा चीक, गोंद.**–५ प्रकार–१ म्हशा ( महिषाक्ष ) २ महानील ३ कुमुद ४ पद्म ५ हिरण्य. गुण–तिखट, कडु, तुरट, पचल्यानंतर तिखट, हलका, सूक्ष्म, रूक्ष, उष्ण, पिच्छिल, तीक्ष्ण, सर्वदोषनाशक विशेषतः कफ-वातघ्न. मल स्वच्छ करणारा. स्वर, वर्ण, यांना हितकर. आमवात. कृमि, वातोदर, प्लीहा, मूळव्याध, प्रमेह, बस्तिरोग, मेदोवृद्धि, गंडमाळा, अपची, सूज, भूतबाधानाशक. **नवा गुग्गुलु**–सुगंधी, स्निग्ध, बृंहण, हृदयाला बल्य, शुक्रवर्धक व सारक शुक्राला हितकर व वातहर द्रव्यात श्रेष्ठ. भंगलेले हाड सांधतो. हा योगवाही आहे. सर्व ऋतूत घेण्यास योग्य आहे. वार्धक्यनाशक, अग्नि, मेधा ( धारणा-शक्ति ) स्मरणशक्ति वाढवणारा. **जुना गुग्गुलु**–दोष धातू क्षीण करणारा. अतिसेवनाने कृशता, नपुंसकता, प्रमेह, तोंडाला शोष, डोळ्याचे रोग इ० अनिष्ट परिणाम होतात.

**गुच्छ**–पु., **समूहः** ( रा. ९.१८४ ) एकत्र बांधलेला.

**–कणिश**–पु., वनस्पति० **रागी** ( रा. १६.१७८ ) नाचणी.

**–करञ्ज**–पु., वनस्पति० कटुस्तिक्त उष्णो वातघ्नो विषकण्डूविचर्चिकाकुष्ठस्पर्शत्वग्दोषनाशनश्च
( रा. ९.१८४ )

हिं.—करंज, करंजभेद.

म.—**चापडा करंज, घाणेरा करंज, वावळा.**

गु.—करंज, चरेल कणसे.

बं.—डहर करंज, नाटा करंज.

त.—पुंगामारम.

गुण–तिखट, कडु, उष्ण, वातनाशक, विषकण्डु, कुष्ठ, स्पर्शदोष, त्वग्दोष व हातापायाच्या चिरण्या नाशक.

**( गुच्छी )**–स्त्री., वनस्पति० **गुच्छकरञ्जः** ( रा. ९.१८४ ) करंजाचा प्रकार. वावळा.

**–दन्तिका**–स्त्री., वनस्पति० **कदली** ( रा. ११.१०६ ) केळ.

**–पत्र**–पु., वनस्पति० **तालः** ( रा. ९.९३ ) ताड.

**–पुष्प**–पु., वनस्पति० **सप्तपर्णः** ( रा. १२.१३८ ) सातवीण.

**–पुष्पक**–पु., वनस्पति० **गुच्छकरञ्जः** ( रा. ९.१८४ ) वावळ.

**( –पुष्पा )**–स्त्री., वनस्पति० **धातकी** ( रा. ६.१५२ ) धायटी.

**( –पुष्पी )**–स्त्री., वनस्पति० **सिगृडी** (रा.परि. ४.३१) पुष्पांचा गुच्छ असणारी पंगुत्वनाशक वनस्पती.

**रीठाकरञ्जः करञ्जभेदः** ( रा. ९.१८६ ) रीठा, रिंगे.

**–फल**–पु., वनस्पति० **गुच्छकरञ्जः** ( रा. ९.१८६ ) वावळा.

**राजादनः** ( रा. ११.१४७ ) खिरणी.

**( –फला )**–स्त्री., वनस्पति० **द्राक्षा** ( रा. ११.७४ ) द्राक्ष.

**कदली** ( रा. ११.१०६ ) केळ.

**काकमाची** ( रा. ४.३६ ) कावळी.

**विष्पावी** ( रापरि. ७.९९ )
मोठी शेंग व मोठा पावटा असलेली चापट शेंगांचे घोस येणारी गावाजवळ वाढणारी वेल.

**अग्निदमनी** ( रापरि. ४.३ )
फार काटे असलेली अगदी लहान फळांचे गुच्छ असलेली वेल.

**–बुध्ना**–स्त्री., वनस्पति० **गुण्डाला** ( रापरि. ५.४२ ) पाण्यात होणारी कडु तिखट वनस्पती.

**–मूलका**–स्त्री., वनस्पति० **गुण्डासिनी**
( रा. परि. ८.६६ )

पाण्यात होणारी गवताच्या पानासारखी पाने असणारी खूप मुळे असलेली वनस्पती,

**गुच्छल**–पु., वनस्पति० **करञ्जभेदः रीठाकरञ्जः** ( रा. ९.१८६ )
रीठा, रिंगे.

**गुच्छाह्वकन्द**–पु., वनस्पति० **गुणाः–मधुरः शीतो वृष्यस्तर्पणो दाहनाशनश्च** ( रा. परि. ७.६१ )
कंदांचा गुच्छ असलेली वनस्पती. गुण–मधुर, थंड, तृप्तिकर व दाहनाशक.

**गुञ्जा**–स्त्री., वनस्पति० **श्वेतरक्तभेदात् द्विविधा; गुणाः–तिक्तोष्णा वान्तिकरी वश्या शूलविषघ्नी च** ( रा. ४.२९ )
**कफविसर्पे हिता** ( सुचि. १७.१५ ) **वाजीकरणचिकित्सायामस्या मूलमुपयुज्यते** ( सुचि. २६.३४ ) **मूलविषविशेषः** ( असंउ. ४० ) **'गुञ्जा–गर्भादिरसेषूपयुज्यमानमेकं द्रव्यम्'** ( वैशासिं. राचि. हृद्रोगचिकित्सा. )
हिं.—रत्ति. घोंगची.
**म.—गुंज.**
गु.—चणोठी, राती, गुंची.
बं.—कुंच.
त.—कुंदुमणि.
फा.—चश्मेखरुस.
गुंजा. प्रकार दोन. पांढरी व लाल. गुण–कडु, उष्ण, वांती करणारी, शूल व विषनाशक वशीकरणास उपयुक्त. हिचे मूळ कामोत्तेजक आहे.
**मान० षड् यवैरेका गुञ्जा** ( र. ११.२ )
वजन. सहा जव म्हणजे एक गुंज.

**गुञ्जाकिनी**–स्त्री., वनस्पति० **गुञ्जा** ( र. १८.८२.८३ )
गुंज.

**–कुटिका**–स्त्री., **सामान्यतो द्रवयुक्तद्रव्यस्य मर्दनेन घनीभूता वर्तुलपिण्डिः, खल्वी रसायनानाम्, औद्भिदानां तु लेहवत्संसाध्य गुडं शर्करां वा अभिमिश्य क्वचिद्गुग्गुलुना वा संमर्द्य निर्मीयते** ( र. १२.१२१–१२३ )
गोळी. गुटी. घुटी. द्रव पदार्थात चूर्ण खलून केलेली गोल व इष्ट प्रमाणाची गोळी. गुळ, साखर किंवा यांचा पाक, मध क्वचित गुग्गुळ घालून ही गोळी करतात.

**–मुख**–वि., **अतीक्ष्णाग्रम्** ( सुचि. ३५.१२ )
गोल तोंडाचा, बोथट तोंडाचा, गुळगुळीत टोकाचा.

**गुटिकाञ्जन**–न., **अञ्जन० वाताभिष्यन्दे उपयुज्यते** ( सुउ. ९.१५–१५ )
एक अंजन. हे वाताने डोळे आल्यास उपयुक्त.

**गुटिकाह्वयलवण**–न., **पाकादिनिर्वृत्तत्वाद्गुटिकाभूतमेव गुटिकालवणमुच्यते, तच्च वृक्षलवणमिति ख्यातम्। गुणाः–कफवातक्रिमिहरं लेखनं पित्तकोपनं दीपनं पाचनं भेदि च** ( सुसू. ४६.३२० )
खारट वनस्पतींचा काढा. आटवून तयार केलेले. तयार झाल्यावर याच्या गोळ्या करितात. म्हणून गुटिकालवण म्हणतात. हे दीपक, पाचक, मळ फोडणारे, कफवात क्रिमिनाशक व दोष खरडून काढणारे.

**गुटिकीकृत**–वि., **गुटिकारूपं कृतम्, अगुटिका गुटिका सम्पद्यमाना, तथा कृतम्** ( सुसू. ४४.१० )
चूर्णाच्या गुटिका केलेले.

**गुड**–पु., **इक्षुविकार० अयं धौताधौतपुराणनवभेदेन चतुर्धा** ( चसू. २७.२३९ ) **तत्राधौतगुणाः–मधुरः सक्षारः नातिशीतः स्निग्धः मूत्ररक्तशोधनः वातघ्नः नातिपित्तजित् मेदः कृमिकरः बल्यो वृष्यश्च** ( सुसू. ४५.१६० )
**'प्रभूत–कृमिमज्जासृङ्–मेदोमांसकरो गुडः'** ( चसू. २७.२३८ )
**धौतगुणाः–मधुरो वातपित्तघ्नोऽसृक्प्रसादनश्च** ( सुसू. ४५.१६१ )
**पुराणगुणाः–स्वादुतरः स्निग्धो लघुरग्निदीपनो विण्मूत्रामयशोधनो रुच्यो हृद्यः पित्तघ्नो वातघ्नस्त्रिदोषघ्नो ज्वरहरः सन्ताप–शांतिप्रदः श्रमहरः पाण्डुप्रमेहान्तकः पथ्यश्च** ( रा. १४.१९९ )
**नवगुडगुणाः–श्लेष्माग्निसादकृत्** ( अहृसू. ५.४८ ) **दाहकर्मण्युपयुक्तः** ( सुसू. १२.४ ) **मद्यनिर्माणे चोपयुज्यते धातकीगुडतोयानि कारणं मद्यशुक्तयोः, लेपार्थमुपयुज्यते** (असंसू. ७.२४३) (असंउ. ३५)
हिं.—गुड, गूड, मीठा.
**म.—गूळ.**
गु.—गोड, गोल.
फा.—कन्देस्याह.
गूळ. उसाचा पदार्थ. हा ( १ ) पूर्ण मळी काढलेला ( २ ) पूर्ण मळी न काढलेला. ( ३ ) नवा ( ४ ) जुना असा चार प्रकारचा. ( १ ) **शुद्ध**–गोड, वात, पित्तनाशक, रक्तदोष सिद्ध करणारा. (२) **अशुद्ध**–

क्षारयुक्त, गोड, थोडा थंड, स्निग्ध, रक्त व मूत्र शोधक, वातनाशक, पित्त थोडे कमी करणारा, बलकर, कृमिकर, शुक्राला हितकर. पुष्कळ कृमि, मज्जा, मेद, रक्त, मांसवर्धक (३) **नवा**–कफवर्धक व अग्निदीपक, मळमूत्राचे रोग दोष शुद्ध करणारा, रुचकर, त्रिदोषनाशक, हृदयाला हितकर, श्रमनाशक, दाहनाशक, पांडुप्रमेह नाशक, लेपाकरिता उपयोगी. मद्याकरिता उपयुक्त.

**मोदकः, लड्डुः, गुटिका** (चचि. ११.५५)
मोदक, लाडू, गोटी.
**पिण्डः, गोलकः** (चसू. १४.५७)
पिंड, गोलक, गोळा.
गुड गुड असा शब्द असलेले.

**–जा**–स्त्री., वनस्पति० **यावनालः** (रा. १४.१६३)
गुळाची साखर, हलक्या दर्जाची साखर.

**(गुडा)**–स्त्री., वनस्पति० **सुधा** (चक. १०.८)
त्रिधारी निवडुंग.

**–गुडायत्**–वि., 'गुड' 'गुड' इति शब्दयुक्तम् (चचि. १३.५५)

**–तृण**–पु., वनस्पति० **इक्षुः** (रा. १४.१८०) ऊस.

**–पाक**–पु., **रसक्रियावलेहः** (र. २२.११७–२०)
गूळ साखर घालून अवलेह करणे.

**–पानक**–न., **गुडसंस्कृतं पानकम्** (चक १०.१४)
गूळ घालून केलेले पन्हे.

**–पुष्प**–पु., वनस्पति० **मधुकः** (ध. ५.४५)
ज्येष्ठमध.

**–पूर**–पु., **गुडयुक्तभक्तान्नविशेषः** (असंउ. ४)
गूळ घालून भाताचे केलेले अन्न.

**–फल**–पु., वनस्पति० **कतकम्** (रा. ११.२३५)
निवळी.
**पीलुः** (ध.५.५१) पीलु.
**बदरम्** (ध. ५.९६) बोर.

**–भल्लातक**–न., योग० **भल्लातकैः सिद्धो गुडः** (चचि. १. (२) १६)
गूळ व भिलावा यांचा कल्प.

**–मञ्जरी**–स्त्री., वनस्पति० **जिङ्गिणी** (ध. परि. ३.३२)
डोंगरात होणारी गोड मंजिरी असलेली–मधाने युक्त मंजिरी असलेली वनस्पती.

**–लावणिक**–पु., **गुडेन लवणेन च संस्कृतो भक्ष्यविशेषः** (चक. १२.२२)
गूळ व मीठ घालून बनवलेला खाण्याचा पदार्थ.



**–वैकृत**–न., **गुडविकृतिः, विकृतम्, ए... विकृतं विकारः** (चचि. ६.४)
गुळाचे विकार. निरनिराळे पदार्थ.

**–शर्करा**–स्त्री., **इक्षुविकार० इयं क्षी... वृष्या स्निग्धा च** (चसू. २७.२४
उसाची साखर. ही उरःक्षताने क्ष... व शुक्राला हितकर, स्निग्ध.
**गाङ्गेटीफलम्, पित्तशूले उपयुज्यते** (सु. उ. ४ .
हे एक फळ पित्तज शूलात उपयुक्त.

**–शुक्त**–न., **आसुत० गुडकृतं मद्यम्** (असंसू.
गुळाची दारू, शिरका.

**–सीधु**–पु., न., **आसुत० गुडकृतः सीधुः** (चचि. २६.१८)
गुळाचा शिरका.

**–सौहित्य**–न., **गुडस्य तृप्तिः, 'मूत्रमार्गविशोधनार्थं चास्मै गुडसौहित्यं वितरेत्'** (सुचि. ७.३५)
गुळाने तृप्ति. मूत्रमार्गाचे शोधन व्हावे म्हणून गूळ पोटभर खावा.

**–हरीतकीयोग**–पु., योग० **वातरक्तरोगेषूपयुज्यते** (सुचि. ५.१२)
गूळ व हिरडा यांचा योग. वातरक्तात उपयुक्त.

**गुडाकेशय**–पु., वनस्पति० **अक्षोटः** (रा. ११.८२)
अक्रोड.

**गुडापूप**–पु., भक्ष्य० **सोमालकम्** (असंउ. ८ इन्दु
गूळ घालून केलेला अनारसा, पुरी, आरोळी,

**गुडाश्रय**–पु., वनस्पति० **अक्षोटः** (ध. ५.६०)
अक्रोड.

**गुडिका**–स्त्री., **गुटिकारूपमूत्रशर्करा** (सुउ. ५९.
गोळीसारखा गोल मूतखडा.

**गुडूचिका**–स्त्री., वनस्पति० **गुडूची** (ध. १.५)
गुळवेल.

**गुडूची**–स्त्री., वनस्पति० **वयःस्थापनगणे एकं द्रव्यम्** (चसू. ४.
**गुणाः–तिक्ता कषाया कटुः (स्वादुविपाका म. उष्णा पित्तमेदःशोषण्याऽऽयुष्या मेध्या सं... बल्या त्रिदोषघ्नी रसायनी जन्तुरक्तार्शःकु... तृष्णापाण्डुवातरक्तच्छर्दिप्रमेहकण्डूविसर्पविष... पलितनाशिनी च** (ध. १.१) **तृषिघ्नी स्तन्यश...** (चसू. ४.११–

**दाहप्रशमनी** ( चसू. ४.१७ ) **व्रणशोधनी** ( सुसू, ३८.६–७ )

**दीपनी** ( असंसू. १३ ) **कामलाघ्नी** ( असंसू. १२.७२ )

**गुडूचीपत्रं कफजे व्रणे आच्छादनार्थमुपयुज्यते** ( सुचि. १.११५ )

**गुडूचीतानः गुडूचीप्रभवस्तन्तुः व्रणसीवनार्थमुपयुज्यते** ( सुसू. २५.२०–२१ )

हिं.—गिलोय, गुलंचा.
म.—**गुळवेल.**
गु.—गलो, गडो.
बं.—गुलंच.
त.—चीन्तिल.
फा.—गलोय.

गुळवेल. कडु, तुरट, तिखट, पचल्यावर गोड, उष्ण, पित्त व मेदशोषक, त्रिदोषघ्नी, रसायनी, आयुष्यवर्धक, बुद्धिवर्धक, बलकर, मलप्रवृत्ति थांबवणारी, पाचक, दाहनाशक, तृप्ति नाहीशी करणारी, व्रण शुद्ध करणारी, पांढरे केस, वळ्या कमी करणारी, जंतु, रक्ती मूळव्याध, कुष्ठ, ज्वर, तहान, प्रमेह, पांडु, कामला, वातरक्त, ओकारी, विसर्प, खाज, विषनाशक, अंगावरचे दूध शुद्ध करते. पान–व्रणावर आच्छादनाकरिता. गुळवेलीचे तंतु व्रण शिवण्याकरिता व पाने कफजव्रणावर आच्छादनास उपयुक्त.

**गुडूच्यादिगण**–पु., द्रव्यगण० **गुडूचीपद्मकारिष्टधानकारक्तचन्दनानि, गुणाः–पित्तश्लेष्मघ्नो ज्वरच्छर्दिदाहतृष्णाघ्नोऽग्निकृच्च** ( अहृसू. १५.१६ )

गुळवेल इत्यादी वनस्पतींचा गण; त्यात गुळवेल, पद्मकाष्ठ, निंब, धणे, रक्तचंदन. **गुण**–पित्तकफनाशक, ज्वर, ओकारी, दाह, तहाननाशक, अग्निदीपक.

**गुडूच्यादिघृत**–न., घृत० **गुडूचीपिप्पलीमूर्वाहरिद्राश्रेयसीवचानिदिग्धिकाकासमर्दपाठाचित्रकनागरेत्येतानि द्रव्याणि चतुर्गुणे जले आपादभागशेषं पक्त्वा तत्समं सर्पिश्च संमिश्र्य यथाविधि सिद्धं कुर्यात् । एतद्गुल्मश्वासक्षयकासनाशनम्** ( चचि. १८.१६१–१६२ )

गुळवेलीने सिद्ध तूप–गुळवेल, पिंपळी, मोरवेल, हळद, गजपिंपळी, वेखंड, रिंगणी, कासविंदा, पहाडमूळ, चित्रक, सुंठ इत्यादी द्रव्यांनी सिद्ध तूप. गुल्म, श्वास, क्षय, खोकलानाशक.

**गुडोद्भवा**–स्त्री., गुडविकार० शर्करा, गुडविकृतत्वात् ( रा. १४.१५९ )

उसाची साखर, काकवीची किंवा गुळाची साखर.

**गुड्गुडायन**–न., गुडगुडेत्यव्यक्तशब्दः **पार्श्वशूले लक्षणविशेषः** ( सुउ. ४२.११८ ) **गुडगुडा इति अव्यक्तानुकरणपरः शब्दः**

गुडगुड शब्द. पार्श्वशूलात हे लक्षण असते.

**गुण**–पु., पदार्थ० **तल्लक्षणं–द्रव्यकर्मभिन्नत्वे सति सामान्यवान् गुणः, 'समवायी तु निश्चेष्टः कारणं गुणः'** ( चसू. १.५१ ) **द्रव्याश्रित इन्द्रियग्राह्यो रूपरसादिकः पदार्थः** (सुसू. ४६.५१४) **'अर्था... विषया गुणाः'** ( चशा. १.३१ ) **धर्मः** ( अहृसू. ९.५ )

**गुणनामानि संख्या च–'सार्था गुर्वादयो बुद्धिः प्रयत्नान्ताः परादयः । गुणाः प्रोक्ताः.......'** ( चसू. १.४९ )

**आयुर्वेदे विंशतिगुणाः–गुरुलघुशीतोष्णस्निग्धरूक्षमन्दतीक्ष्णस्थिरसरमृदुकठिनविशदपिच्छिलश्लक्ष्णखरसूक्ष्मस्थूलसान्द्रद्रवाः** ( चशा. ६.१० )

**रसवीर्यविपाकानामपि गुणसंज्ञा** ( अहृसू. ९.२२ हे )

**नानाद्रव्याश्रिता गुणाः–कर्मभिरनुमीयन्ते** ( सुसू. ४६.५१४ )

सात पदार्थांपैकी एक पदार्थ. **लक्षण**–द्रव्य कर्म या खेरीज सामान्यवान्--जातिमान् पदार्थ. समवायसंबंधाने असणारे गतिविरहित कारण गुण. द्रव्याच्या आश्रयाने राहणारे इंद्रियांनी कळणारे रूपरसादिक पदार्थ–**नावे संख्या**–सार्थ–अर्थासह–शब्दस्पर्शरूपरसगंध हे पाच--गुर्वादि--गुरु, लघु, शीत, उष्ण, स्निग्ध, रूक्ष, सौम्य, तीक्ष्ण, स्थिर, सर, मऊ, कठीण, स्वच्छ, बुळबुळीत, गुळगुळीत, खरखरीत, स्थूल, सूक्ष्म, घट्ट, द्रव हे वीस. बुद्धि एक. ( बुद्धिशब्दाने स्मृति चेतना धृति ( निश्चयी बुद्धि ) अहंकार इ० घेतात ) प्रयत्नात इच्छा द्वेष सुखदुःख प्रयत्न हे ५. परादि–पर, अपरत्व, युक्ति, संख्या, संयोग, विभाग, पृथक्त्व, परिणाम, संस्कार, अभ्यास हे दहा असे स्थूलतः ४१ गुण आहेत.

**सांख्ये त्रयो गुणाः सत्त्वं रजस्तमश्चेति** ( सुशा. १.३ )

**'सत्त्वं रजस्तमश्चेति त्रयः प्रोक्ता महागुणाः'** ( अहृसू. १ )

**आयुर्वेदे सांख्ये च गुण–गुणिनोः परमार्थतो भेदो नास्त्येव** ( चशा. १.६४ चक्र. )
सांख्य शास्त्रात तीन गुण. सत्व, रज व तम हे. यांनाच आयुर्वेदात महागुण म्हटले आहे. आयुर्वेद व सांख्य यांच्या मताने गुण व गुणवान यात मूलगामी असा फरक नाहीच.
**शरीरधातवो मलाश्चापि गुणा इत्युच्यन्ते** ( चशा. ६.१७ )
शरीर धातु व मळ हेही गुण म्हटले जातात.
**प्रसादः उत्कृष्टो भागः** ( सुउ. १.२० )
सार--उत्कृष्ट भाग.
**फलं विसंज्ञः पश्चिमे शेते नष्टकर्मक्रियागुणाः** ( सुउ. ४७.१२ )
क्रियेचे फळ. कर्माचा परिणाम.
**अणिमादिसिद्धि०, स्वभावो वा** ( सुउ. ६०.२० )
अणिमा महिमा इत्यादी अष्टसिद्धि. स्वभाव.
**आकाशादिभूतम्,...'स गुणोपादानकालेऽन्तरिक्षं पूर्वतरमन्येभ्यो गुणेभ्य उपादत्ते....।'** ( चशा. ४.८ )
आकाशादी भूते. गर्भात अंतरिक्षगुण प्रथम घेतला जातो.
**रज्जुः, सूत्रं वा** ( सुउ. १.१९ )
दोरी, दोरा.
**प्रमाणं, संख्याया आवृत्त्या वर्धनम् यथा द्विगुणं द्विप्रमाणम्** ( अहृक. ६.१५ )
प्रमाण. संख्येची पटीने वाढ जसे दुप्पट, तिप्पट.
**अप्रधानः** ( चक. १२.४४ )
प्राधान्य नसलेले. गौण.
**सद्गुणः** ( सुसू. ४०.१० )
चांगला गुण.
**–कर्णिका**–स्त्री., **वनस्पति० इन्द्रवारुणी** ( रा. ३.३७१ )
कवंडळ, इंद्रावण.
**–ग्रहण**–न., **भूतग्रहणम्** ( चशा. ४.८ )
आकाशादी भूतांचे ग्रहण करणे.
**–त्रय**–न., **सत्त्वरजस्तमांसि** ( असंसू. २१.३२ )
सत्व, रज, तम हे तीन.
**–प्रिया**–स्त्री., **वनस्पति० दन्ती** ( धं. १.२२३ )
दांती.
**अतिविषा** ( ध. १.११ ) अतिविष.
**–विनिक्षेप**–पु., **गुणपरिमाणम्** ( चवि. ८.१९ )
गुणांचे कमी अधिक प्रमाण.
**–संपद्**–स्त्री., **उत्कृष्टगुणता** ( चसू. १.१३३ )
उत्कृष्ट गुणत्व. चांगल्या गुणांचा दर्जा.
**–सम्पन्न**–वि., **इष्टै रसगन्धस्पर्शवर्णैरुपेतम् (अन्नम्)** ( सुसू. ४६.४४६ )
अनुकूल पाहिजे त्या रस वास स्पर्श वर्ण यांनी युक्त.
**–सार**–पु., न., **गुणोत्कर्षः** ( अहृसू. ९.१५ )
गुणांच्या दर्जाचे आधिक्य.
**–सू**–स्त्री., **वनस्पति० कार्पासी** ( रा. परि. ४.४५ )
कपाशी.
**गुणाढ्य**–पु., **वनस्पति० अङ्कोटः** ( रा. ९.३८४ )
अंकोल.
**गुणान्तराधान**–न., **संस्कारः** ( चवि. १.२१ ( २ )
अन्य गुण निर्मिति करण्याचे कर्म.
**गुणिन्**–पु.,**गुणयुक्तः भूतरूपगुणवानात्मा** ( चशा. ४.८ )
गुणवान्, भूतरूपगुणवान्. ( आत्मा )
**गुणोज्ज्वला**–स्त्री., **वनस्पति० यूथिका** ( ध. ५.१४८ )
जुई.
**गुण्ठ**–पु., **वनस्पति० कत्तृणम्** ( ध. १.८३ )
रोहिस गवत.
अरु. **वृत्ततृणः कुदगुण्ठिका** ( अहृसू. १५.२४ )
वाटोळे गवत. गाठाळ गवत.
**गुण्ड**–पु., **वनस्पति० अयं वृत्तस्थूललघुभेदेन त्रिधा, स्थूलस्तु अधिकगुणः, गुणाः–मधुरः शीतः कफपित्तघ्नः अतिसारदाहरक्तहरः** ( रापरि. ८.६० )
कांडी लांब, त्रिकोणी, तीन धारांची, पाने निळी व तरवारीच्या पानासारखी असलेली, छत्रीसारखे गुच्छ असणारी वनस्पती. वाटोळी लांब कांडी असलेली पाण्याच्या आश्रयाने होणारी वनस्पती. हिच्यात जाड व बारीक असे दोन प्रकार. एकूण तीन प्रकार. गवती चहा. गोंडाळ जाड कांड्यांची अधिक गुणवान्. **गुण**–गोड. थंड, कफपित्त, अतिसार दाह व रक्तदोषनाशक.
**–कन्द्**–पु., **वनस्पति० गुणाः–अल्पमधुरः कषायः शीतोऽतिखरो रक्तपित्तदाहश्रमापहः** ( रापरि. ८.६३ )
लहान नागरमोथा. गुण--तुरट, थोडा गोड, थंड, अती खरखरीत, थकवा, दाह व रक्तपित्तनाशक.
**(गुण्डा)**–स्त्री., **वनस्पति० गुण्डासिनी** ( रापरि. ८.६६ )
गवताच्या पानासारख्या पानांची पसरट पाण्यात होणारी वनस्पती.
**गुण्डाख्य**–पु., **वनस्पति० स्नुही** ( रा. ८.३५५ )
त्रिधारी निवडुंग.

**गुण्डाला**–स्त्री., वनस्पति० गुणाः–कटुस्तिक्तोष्णा शोफ-व्रणविनाशिनी ( रापरि. ५.४२ )
पाण्यात होणारी वनस्पती. गुण–तिखट, कडु, उष्ण, सूज व जखमनाशक.

**गुण्डासिनी**–स्त्री., वनस्पति० गुणाः–कटुस्तिक्ता उष्णा पित्तघ्नी दाहश्रमव्रणदोषश्वयथुघ्नी च ( रापरि. ८.६६ )
पाण्यात होणारी चपटी पसरट व गवतासारख्या पानांची मुळांचा गुच्छ असणारी वनस्पती. ही तिखट कडु उष्ण पित्तनाशक दाह श्रम व्रणदोष व सूजनाशक.

**गुण्डूरूकी**–स्त्री., वनस्पति० व्रीहिः ( रा. १६.९९ )
एक प्रकारचा तांदूळ.

**गुण्डूग्रन्थि**–पु., वनस्पति० मुस्ता ( रा. ६.५८ )
नागरमोथा.

**गुद**–न., शारीर० गोदते खेलति चलति वा अपानवायुरनेन इति गुदम् दशप्राणायतनेष्वेकम् ( चसू. २९.३ ) बहिर्मुखस्रोतसामेकम् ( सुशा. ५.१० ) मर्म० ( चशा. ७.९ ) एतत्सार्धचतुरङ्गुलप्रमाणम्, स्थूलान्त्रप्रतिबद्धमर्धपञ्चाङ्गुलम् ( सुनि. २.५ ) एतद्रक्तश्लेष्मप्रसादाज्जायते ( सुशा. ४.२६–२७ ) उत्तरगुदमधरगुदमित्यस्य द्वौ भागौ ( चशा. ७.१० )
मळ आणि वात खाली सोडणारे इंद्रिय. प्राणाचा आधार असलेल्या दहा स्थानांपैकी एक. शरिरातील मळ बाहेर घालविण्याचा एक मार्ग. त्याचे बाहेरचे तोंड हे साडेचार अंगुळांचे मोठ्या आतड्याशी संबद्ध. हे रक्त व कफ यांच्या साररूप अंशांपासून झाले आहे. याचे दोन भाग. वरचे व खालचे गुद.

**–किट्ट**–पु., रोग० बालरोगः, अहिपूतनः ( र. २२.१४७ )
बालरोग. घाम, मळाचा लेप यापासून व्रण होतात तो. रक्त व कफदुष्टीमुळे.

**–कील**–पु., अर्शोरोगः ( सुसू. ४६.३०७ )
मूळव्याधीचे मोड.

**–कुट्ट**–पु., रोग० बालरोगः अहिपूतनः ( असंउ. २ )
बालरोग. पहा ' गुदकिट्ट '.

**–क्षणन**–न., लक्षण० गुदनाशनम् ( चचि. १४.९ )
गुदाचा नाश, गुद चिरणे, त्याला जखम होणे.

**–ग्रह**–पु., लक्षण० बस्तावभिहते संभवदेकं लक्षणम् ( चसि. ९.६ )
गुदे वातवेदना ( चइ. १०.१७ )
गुद जखडल्यासारखे, संकुचित झाल्यासारखे वाटते. बस्तीत आघात झाल्यास होणारे लक्षण. गुदात वाताच्या वेदना होणे.

**–ज**–न., अर्शोरोगः ( असंसू. १२.४९ )
मूळव्याध.

**–निष्क्रमण**–न., लक्षण० गुदाद्बहिरागमनम् ( चवि. ७.१३ )
गुदभ्रंश, गुद बाहेर येणे.

**–निस्सरण**–न., लक्षण० गुदभ्रंशः ( चचि. १९.४२ )
गुदभ्रंश, गुद बाहेर येणे.

**–परिकर्तन**–न., लक्षण० गुदस्य सर्वतः कर्तनवद् वेदना ( सुचि. ३४.८ )
गुदात सर्व बाजूंनी कातरल्यासारखी पीडा, मुरडा.

**–परिभ्रंश**–पु., रोग० गुदभ्रंशः ( र. १६.४१ )
गुदद्वार बाहेर येणे.

**–पाक**–पु., रोग० चत्वारिंशत्पित्तविकारेष्वेकः ( चसू. २०.१४ ) रक्तप्रदोषजरोगेष्वेकः ( चसू. २८.१२ )
गुद पिकणे, चाळीस पित्तविकारांपैकी एक, रक्तदुष्टीपासून होणारा एक रोग.

**–पार्श्व**–परिव. पु., गुदसमीपभागः ( सुनि. ४.९ )
गुदाच्या जवळचा बाजूचा भाग.

**–भ्रंश**–पु., रोग० गुदस्य स्वस्थानाच्च्युतिः, अशीतिवातविकारेष्वेकः ( चसू. २०.११ ) मध्यममार्गजो विकारः ( चसू. ११.४९ ) तत्र चिकित्सा–गुदं स्विन्नं स्नेहाभ्यक्तं प्रवेशयेत्। वायोर्विनिर्गमार्थं मध्यच्छिद्रेण चर्मणा गोफणाबन्धं कारयेत्। मुहुर्मुहुः स्वेदः कार्यः। महत्पञ्चमूलसिद्धं तैलं पानाभ्यङ्गार्थं यथाबलं प्रयोजयेत् ( सुचि. २०.६१–६३ )
गुद बाहेर येणे. अंग बाहेर येणे. बुंभळ बाहेर येणे. ८० वातविकारांपैकी मध्यम मार्गातील विकार. **उपचार**–गुद शेकून योग्य ते तेल लावून आत घालावे. मध्ये छिद्र असलेल्या चामड्याने गोफणेचा बंध बांधावा. वायु सरण्यास मार्ग रहातो. स्वेद मधून मधून करावा. मोठ्या पंचमुळांनी सिद्ध केलेले तेल पिण्यास व अभ्यंगाकरिता योजावे.

**–मण्डल**–न., गुदं परितो भागः ( सुचि. ८.२४ )
गुदाच्या भोवतालचा भाग.

**-मर्मन्**-न., **उदरमर्म** ( सुशा. ६.६ )
गुद हे मर्मस्थान आहे. मर्म.
**अधरगुदस्थानं येन पुरीषं निष्क्रामति**
( चशा. ७.१० चक्र. )
ज्या गुदाच्या भागाने मळ बाहेर फेकला जातो तो.
**मांसमर्म, 'गुदरोहितानि...मांसमर्माणि'**
( सुशा. ६.७ )
हे मांसमर्मांपैकी एक.
**सद्यः प्राणहरं मर्म** ( सुशा. ६.९ )
**एतदेकमेव चतुरङ्गुलं च** ( सुशा. ६.२५ )
याला जोराचा आघात झाला तर लवकर प्राणनाश होतो. हे ४ अंगुळे आहे.

**-वलि**-स्त्री., **गुदस्थिता वलयः, अध्यर्धाङ्गुलान्तर-सम्भूताः प्रवाहणी विसर्जनी संवरणी चेति तिस्रः चतुरङ्गुलायताः सर्वास्तिर्यगेकाङ्गुलोच्छ्रिताः। प्रथमा तु गुदौष्ठादङ्गुलमात्रैव** ( सुनि. २.५ )
गुदाची वळी. या तीन. दीड दीड अंगुलांतराने त्या आहेत. ( १ ) प्रवाहिणी मळाला गति देते, ढकलते ( २ ) मळ बाहेर टाकते, त्याचे विसर्जन करिते. व ( ३ ) गुद मिटते. प्रत्येक चार अंगुळे विस्तृत व एक अंगुळ जाडीची. पहिली वळी गुदाच्या ओठापासून एक अंगुळ अंतरावर.

**-वलीमुख**-न., **गुदवल्या द्वारम्** ( असंसू. २८ )
गुदाच्या वळीचे तोंड, दार.

**-विद्ध**-न., **गुदस्य च्छेदः** ( सुचि. ७.३६ )
गुद कापणे.

**-शूल**-पु., न., लक्षण० **सातत्येन गुदपीडा**
( चचि. १३.४१ )
गुदात सतत शूळ.

**-शोथ**-पु., लक्षण० **गुदश्वयथुः** ( चसू. २५.४० )
गुदात सूज.

**-श्वयथु**-पु., लक्षण० **गुदशोथः** ( चचि. १४.६२ )
गुदाची सूज.

**-स्तम्भ**-पु., लक्षण० **गुदस्तब्धत्वम्** ( चसि., ६.८९ )
गुदाची हालचाल–कार्य थांबणे–कमी होणे.

**-स्रव**-पु., लक्षण० **गुदास्रावः** ( अहसू. १६.३१ )
गुदातून पाणी, मळ, रक्त, पू इत्यादींचा स्राव.

**-स्राव**-पु., **गुदमार्गेण जलादेः स्रावः**
( चचि. १३.४७ )
गुदातून पाणी, मळ, रक्त, पू इत्यादींचा स्राव.

**गुदाङ्कुर**-पु., रोग० **अर्शोरोगः** ( र. १३.८२ )
गुदात होणारे अंकुर, कोंब, मूळव्याध.

**गुदार्ति**-स्त्री., **गुदशूलः** ( असंसू. २०.१३ )
**अशीतिवातविकारेष्वेकः** ( चसू. २०.११ )
गुदमार्गात शूळ, ८० वातविकारांपैकी एक विकार.

**गुदालय**-वि., **गुद एव आलयः स्थानं यस्य सः ( अपानो वायुः )** ( सुनि. १.९ )
ज्याचे स्थान गुद आहे तो ( अपानवायु ).

**गुदाश्रयरोग**-वि., **गुदस्थानाश्रितरोगाः अर्शोभगन्द-राहिपूतनादयः** ( सुनि. १.२० )
गुदस्थानात होणारे रोग. मूळव्याध, भगंदर, अहिपूतना इ.

**गुदास्थि**-न., अस्थि० ( सुशा. ५.१९ ) गुदाचे हाड.

**गुदास्थिविवर**-न., **गुदास्थिसंबन्धि विवरम्**
( सुनि. ३.१९ )
**तत्र स्थिता अवयवा बस्तिः, बस्तिशिरः, पौरुषं वृषणं गुदमित्येवमादयः** ( सुनि. ३.१९ )
**तत्संबन्धीन्यस्थीनि पञ्च श्रोण्यस्थीनि**
( सुशा. ५.१९ )
गुदास्थिसंबद्ध जी पोकळी आहे तिच्यात बस्ति, बस्तिशिर, शिश्न, वृषण व गुद इ० अवयव आहेत. यांच्याशी संबद्ध कमरेतली पाच हाडे; त्यांना श्रोण्यस्थि म्हणतात.

**गुदोत्तर**-न., **गुदस्योत्तरभागः** ( चशा. ३.६ )
गुदाचा वरचा भाग.

**गुदोपलेप**-पु., **गुददुष्टिः** ( चचि. १५.२०६ )
**गुदस्योपलिप्तत्वम्, मलेन गुदावरोधः**
( सुसू. ४२.१० ( १ )
गुददुष्टि, गुद मळाने भरणे, मळाने गुदाचा अवरोध.

**गुदौष्ठ**-पु., शारीर० प्रमाणं-**'रोमान्तेभ्यो यवाध्यर्धः' अर्धाङ्गुलमस्य प्रमाणमित्यर्थः** ( सुनि. २.६ )
केसांची मर्यादा संपली की, अर्ध्या अंगुल अंतरावर अथवा दीड यव अंतरावर गुदाचा ओठ आहे.

**गुन्द्र**-पु., **गुन्द्रा** ( भाप्रनि. ) मृदु दर्भ.

**( गुन्द्रा )**-स्त्री., दर्भ०, **कुशः** ( ध. ४.१३३ )
दर्भप्रकार, कुश.
**तृणजातिः** ( असंउ. ४४ इन्दु. )
**रक्तपित्ते प्रलेपार्थम्** ( चचि. ४.१०३ )
गवताचा प्रकार. रक्तपित्तविकारावर लेपाकरिता.
**जलतृणः एरका (हे;) शर इत्यपरे, पदएरकः** ( अरु; )
**गुच्छपुष्पिकेति केचित्** ( सुसू. ३९.८ ) **मूत्रविरे-चनीयगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१५ )
पाण्यात होणारे गवत. शर, तृण, मूत्रविरेचक-गणातील एक.

**पट्टोरकभेदः** ( सुचि. ३७.३१ ) एक वनस्पती.
**पट्टरकभेदः भद्रमुस्ता** ( सुचि. १७.६ )
भद्रमोथा, नागरमोथा.
**गुलुञ्चः** ( चसू. ४.१२ चक्र ) एक वनस्पती.

**गुन्द्रा**–स्त्री., ( ध. ४.१३३ ) **मृदुदर्भः** मऊ दर्भ.
–**भस्मन्**–न., योग० **गुन्द्रां मनःशिलां हरतालं चैकीकृत्य दग्ध्वा साधितं भस्म यच्च उपदंश-विसर्पाणां शमनम्** ( सुचि. १९.४६–४७ )
गुंद्रेचे भस्म. गुंद्रा, मनशीळ, हरताल एकत्र करून जाळून केलेले भस्म. उपदंश, विसर्प यांचे शमन करते.

**गुपित**–वि., **आकुलीकृतम्** ( सुउ. ४२.५–६ ) प्रकुपित.
**व्याकुलितम्, परस्परमतिक्रान्तम्** ( सुचि. २.६२ )
परस्परात गुंतलेले, अडकलेले.

**गुप्त**–वि., **रक्षितम्** ( असंसू. ८ )
राखलेले, रक्षण केलेले.

**( गुप्ता )**–स्त्री., वनस्पति० **कपिकच्छूः** ( रा. ३.२०१ )
खाजकुहिली.
–**गन्धि**–न., वनस्पति० **एलवालुकम्** ( रा. ४.१३४ )
एक सुगंधी द्रव्य.
–**फल**–न., **कपिकच्छूफलम्** ( सुउ. ४६.२३ )
खाजकुहिलीची शेंग.
–**स्नेह**–पु., वनस्पति० **अङ्कोलः** ( रा. ९. ३८३ )
अंकोल.
–**हृदय**–वि., **विषघ्नै रक्षितहृदयः प्रच्छादितहृदयः** ( सुक. १.८५ )
विषघ्न औषधांनी रक्षण केलेले हृदय ज्याचे असा.

**गुप्ति**–स्त्री., **मन्त्रादिना पिशाचादिभ्यो रक्षा** ( चवि. ३.१५ )
मंत्रांनी पिशाचांपासून रक्षण.

**गुरडक**–पु., वनस्पति० **व्रीहिः** ( रा. १६.११४ )
एक प्रकारचा तांदूळ.

**गुरु**–पु., **गुणविशेषः पृथिवीसोमगुणभूयिष्ठोऽलघुः** ( चशा. ६.१० )
**यस्य द्रव्यस्य बृंहणे शक्तिः स गुरुः** ( हे. अहृसू. १.१८ )
**अयमग्निगुणविपरीतत्वादग्निमान्द्यकरः** ( असंसू. ११ )
**अयं चिरपाकी** ( सुसू. ४५.१९८ )
**गुणतः पाकतश्च यद्गौरवकरं तद्द्रव्यम्** ( सुउ. ५०.३० ) **तस्य कर्माणि अग्निसादोपलेपबलोप-चयतर्पणबृंहणानि** ( सुसू. ४६.५१७ )
एक गुण. पृथ्वी व जलगुणभूयिष्ठ लघु नसलेला गुण. बृंहण करण्याचे सामर्थ्य ज्या गुणात तो. अग्निगुणाच्या विपरीत म्हणून हा अग्निमांद्य करणारा पचनाला वेळ लागतो. गुणाने व पाकाने जे गौरव-कर ते द्रव्य. **कर्म**–अग्नि मंद, मांसवृद्धि, बलसंचय तृप्ति, पुष्टि.
**महान्** ( अहृसू. १२.७१ ) मोठा.
**अध्यापकः उपदेशकः** ( चनि. ७.१० )
शिकविणारा, उपदेश करणारा.
**मातृपितृप्रभृतयः** ( सुउ. ४१.५८ )
आईबाप इत्यादी.
**भूताधिपतिः** ( असंउ. ७ )
भूतांचा स्वामी.
**वनस्पति० शिंशपा** ( ध. ५.१२१ ) शिसव.
**कपिकच्छूः** ( रा. ३.२०१ )
खाजकुहिली.
**खनिज० वङ्गम्** ( ध. ६.१३ ) कथिल.
–**कोष्ठ**–वि., **क्रूरकोष्ठः, मलपूर्णकोष्ठः** ( चसि. ७.७ )
जड कोठा, मळ साचलेला–भरलेला कोठा, रेचक लागू न होणारा.
–**गात्रता**–स्त्री., **गात्राणां गौरवम्, विंशतिश्लेष्म-विकारेष्वेकः** ( चसू. २०.१७ )
अवयव जड वाटणे, अंग जड वाटणे, कफाच्या २० विकारांपैकी एक विकार.
–**गात्रत्व**–न., लक्षण० **गात्राणां गुरुत्वम्** ( चनि. १.३३ )
अवयव जड वाटणे.
–**तण्डुला**–स्त्री., वनस्पति० **व्रीहिः** ( रा. १६.११८ )
एक प्रकारचा तांदूळ.
–**ता**–स्त्री., लक्षण० **गुरुत्वम्** ( असंसू. ७.१६७ )
जडपणा, जाड्य.
–**प्रवृत्ति**–वि., **गुरुस्वभावम्** ( चवि. ८.१२७ )
जड स्वभावाचा.
–**प्रावरण**–न., **रल्लकादिप्रावरणं गुरुत्वेन परिहितं सन्निरग्निकस्वेदोपयोगि** ( सुचि. ३२.१५ )
रग, दुलई., गोधडी इत्यादी जाडजूड पांघरूण. अग्नीवाचून घाम आणणारे.
–**बीज**–पु., वनस्पति० **मसूरिका** ( रा. १६.१४९ )
मसूर.

**-भोजन**–न., दुर्जरमन्नं तदशनं वा ( असंसू. १३ )
पचावयाला जड असे अन्न, किंवा असे अन्न खाणे.

**-लाघव**–न., गुरुत्वं लघुत्वं च ( सुसू. ४६.१३० चसू. २७.३४३ )
जड व हलके.

**-लाघवचिन्ता**–स्त्री., द्रव्याणां गौरवलाघवविषयको विचारः, स च अल्पबलमन्दक्रियसुकुमारसुखोचितानां कृते आवश्यकः ( चसू. २७.३४३ )
जड व हलके असा विचार. अल्प बलाचा, हल्के काम करणारा, सुकुमार, सुखवस्तु स्थितीत रहाणाऱ्याकरिता हा उपयुक्त.

**-शालि**–वनस्पति० व्रीहिः ( रा. १६.९९ )
एक प्रकारचा तांदूळ.

**-समुत्थान**–वि., यत्संशोधनक्लिष्टं शरीरं महता प्रयत्नेन चिरेण च कालेन प्रकृतिं प्राप्नोति ( चवि. ८.१२७ )
संशोधनाने त्रस्त झालेले–कृश झालेले शरीर मोठ्या प्रयत्नाने व दीर्घकालाने आरोग्ययुक्त होते.

**गुरुक**–वि., लक्षण० गौरवयुक्तम् ( सुचि. ५.३२ )
जाड्ययुक्त. जडपणा असलेला.

**गुरुवक**–पु., वनस्पति० व्रीहिः ( रा. १६.१४४ )
तांदूळप्रकार.

**गुर्जरमण्डल**–न., गुर्जरदेशः ( र. ३.१६२ )
गुजराथ देश.

**गुर्वाक**–पु., वनस्पति० पूगफलम् ( ध. ३.३९ )
सुपारी.

**गुर्वीफल**–न., वनस्पति० पूगीफलम् ( र. १६.१७–२३ )
सुपारी.
लघुकपिकच्छूफलम् ( र. १६.१७–२३ )
लहान खाजकुहिलीची शेंग.

**गुलाल**–पु., वनस्पति० भूतृणम् ( र. ८.७३ )
रोहिसगवत.

**गुलिका**–स्त्री., कल्प० गुटिका गोलाकारं भैषज्यद्रव्यम् ( चचि. १५.१८४ )
गोळी, गोल आकाराचे बनवलेले औषध.

**-मुख**–वि., गुलिकासदृशमतीक्ष्णाग्रं मुखं यस्य ( अहृसू. १९.१० )
एक यंत्र. गोल टोकाचे बोथट तोंड असलेले यंत्र.

**गुलुच्छकन्द**–पु., वनस्पति० गुच्छाह्वकन्दः ( रा. परि. ७.६१ )
अनेक कंदांचा गुच्छ असलेली वनस्पती.

**गुल्फ**–पु., शारीर० पादजङ्घयोर्मध्ये स्थितः संधिभागः ( चवि. ८.१०७ )
'दशगुल्फतलयोः' ( सुशा. ५.३७ )
एकं जालकम् ( सुशा. ५.१२ ड )
पञ्च स्नायवः ( सुशा. ५.२९ )
अस्थिसंघातः ( सुशा. ५.१६ )
घोटा, पाऊल व पोटरीमधील सांधा. दहा पेशी, गुल्फ व तल यात एक जाळे, पाच स्नायु व अस्थींचा गट.

**-कर्ण**–पु., गुल्फस्य कर्ण इव भागः ( सुचि. १८.२६ )
घोट्याचा कानासारखा भाग.

**-ग्रह**–पु., गुल्फस्य ग्रहः अशीतिवातविकारेष्वेकः ( चसू. २०.११ )
घोटा जखडणे, आखडणे, न हालणे; ऐशी वातविकारातील एक.

**-मर्मन्**–न., मर्म० सक्थिमर्म ( सुशा. ६.६ )
गुल्फसंधिस्थाने ( सुशा. ६.२४ )
संधिमर्म० ( सुशा. ६.७ ) रुजाकरमर्म, 'गुल्फौ द्वौ.....कूर्चशिरांसि च रुजाकराणि जानीयात्' ( सुशा. ६.२४ )
तत्र विद्धस्य स्तब्धपादता खञ्जता वा ( सुशा. ६.२४ )
गुल्फमर्मणी द्वे ( सुशा. ६.१४ )
एतद् द्वयमङ्गुलप्रमाणम् ( सुशा. ६.२८ )
'सन्धिमर्मेदं द्वयङ्गुलप्रमाणं वैकल्यकरं च ( सुशा. ६.२४ ड. )
खालच्या शाखेतले मर्म–घोट्यातले. या मर्मावर आघात झाला तर वेदना फार होतात. पाय जखडतो, लंगडा होतो, प्रमाण दोन अंगुळांचे.

**-शूल**–पु., लक्षण० गुल्फस्य शूलः ( चसि. २,१६ )
घोट्यात शूळ.

**-शोष**–पु., लक्षण०, गुल्फस्य शोषः ( चसि. २.१६ )
घोटा सुकणे, बारीक होणे.

**-संधि**–पु., पादजङ्घयोर्मध्ये संधिः ( असंशा. ७.१४ ) कोरजातीयः एकश्चलसंधिः, 'जानुगुल्फवङ्क्षणेष्वेकैकः ( सुशा. ५.२६—२७ )
गुडघा इ० मधला खोलगट सांधा.

**-स्तम्भ**–पु., लक्षण०, गुल्फस्य स्तम्भः ( चसि. २.१६ )
घोटा ताठरणे–जखडणे, न हालणे.

**गुल्फास्थि**–न., अस्थि०, द्वे गुल्फास्थिनी
(सुशा. ५.१९)

घोट्याचा सांधा करणारे अस्थि–हाडे.

**गुल्म**–पु.,–रोग० रक्तदोषजविकारेष्वेकः (चसू. २८. १२) हृन्नाभ्योरन्तरे संचारी वाऽचलो वा चयापचयवान् यो ग्रन्थिः स गुल्मः (सुउ. ४२.४) गुल्मव्यपदेशो, लोके तत्सादृश्यात् गुल्मनिरुक्तिः "कुपितानिलमूलत्वाद् गुदमूलोदयादपि। गुल्मवद्वा विशालत्वाद् गुल्म इत्यभिधीयते" संहतिविशेषेण अवस्थिता मनुष्यवृक्षादयो गुल्मव्यपदेशं भजन्ते (सुउ. ४२.५–६ डल्हणः) गुह्यते वेष्ट्यतेऽनेनेति गुल्म इति हलायुधः (मा.) गुल्मोत्पत्तिः–तस्मिन् हि दक्षाध्वरध्वंसे देहिनां नानादिक्षु विद्रवतामभिद्रवणतरणधावनप्लवनलङ्घनाद्यैर्देहविक्षोभणैः पुरा गुल्मोत्पत्तिरभूत्। (चनि. ८.११) संप्राप्तिः–मिथ्याहारविहारतः प्रकुपिता वातादयो बस्तिनाभिपार्श्वहृदयेषु ग्रन्थिरूपिणं गुल्मं पञ्चधा जनयन्ति (मा.) अयं बाह्यान्तरभेदेन द्विधा। तत्रान्तरगुल्मलक्षणानि–बस्तिकुक्षिहृत्प्लीह्नां वेदनाऽग्निवर्णबलानां च भ्रंशो वेगानामप्रवृत्तिश्च (असंनि. ११.४६) बहिर्गुल्मलक्षणानि–कोष्ठाङ्गेषु नातिरुगवकाशस्य वैवर्ण्यं बहिरधिकमुन्नतता च (असंनि. ११.४७) पूर्वरूपम्–अनन्नाभिलषणमरोचकाविपाकावग्निवैषम्यं विदाहो भुक्तस्य पाककाले चायुक्त्या छर्दिरुद्गारश्च, वातमूत्रपुरीषवेगानां चाप्रादुर्भावः प्रादुर्भूतानां चाप्रवृत्तिरीषदागमनं वा, वातशूलाटोपान्त्रकूजनापरिहर्षणातिवृत्तपुरीषताऽबुभुक्षादौर्बल्यानि सौहित्यस्य चासहत्वम् (चनि. ३.१५) लक्षणम्–स्वहेतुभिः प्रकुपितो वायुर्महास्रोतोऽनुप्रविश्य रौक्ष्यात्कठिनीभूतमाप्लुत्य पिण्डितोऽवस्थानं करोति स शूलमुपजनयति ग्रन्थींश्चानेकविधान्। मुहुराध्मति मुहुरल्पत्वमापद्यते। अनियतविपुलाणुवेदनश्च भवति। मुहुः पिपीलिकासंप्रचार इवाङ्गेषु तोदभेदस्फुरणायामसंकोचसुप्तिहर्षप्रलयोदयबहुलस्तदाऽऽतुरः सूच्येव शङ्कुनेवाभिसंविद्धमात्मानं मन्यते। दिवसान्ते ज्वर्यते। शुष्यति चाऽस्यमस्य। उच्छ्वासश्चोपरुध्यते हृष्यन्ति च रोमाणि वेदनायाः प्रादुर्भावे। अयं वातगुल्मः। पित्तगुल्मे तु स्वहेतुभिः प्रकुपितं पित्तं मारुतेन सह प्रकोपमापद्यते। पित्तं त्वेनं विदहति कुक्षौ हृद्युरसि कण्ठे च। स दह्यमानः सधूममिवोद्गारमुद्गिरत्यम्लान्वितम्। गुल्मावकाशश्चास्य दह्यते दूयते धूप्यते ऊष्मायते स्विद्यति क्लिद्यति शिथिल इव स्पर्शासहोऽल्परोमाञ्चश्च भवति। हरितहारिद्रत्वङ्नखनयनवदनमूत्रपुरीषश्च भवति। कफगुल्मे स्वहेतुभिः प्रकुपितः श्लेष्मा मारुतेन सह कुप्यति। स शीतज्वरविशेषारोचकाविपाकाङ्गमर्दहृद्रोगच्छर्दिनिद्रालस्यस्तैमित्यगौरवशिरोभितापानुपजनयति। श्वैत्यं त्वङ्नखादिषु सांनिपातिकगुल्मस्तु त्रिदोषहेतुलिङ्गसंनिपाते भवति। स विरुद्धोपक्रमत्वादसाध्यः। शोणितगुल्मस्तु स्त्रिया एव भवति। (चनि. ३.१३) अनुपशयः–वातगुल्मे रूक्षं कषायतिक्तं कटु च नोपशेते (चचि. ५.११) उपद्रवाः–वातगुल्मे प्लीहाटोपान्त्रकूजनाविपाकोदावर्ताङ्गमर्दमन्याशिरःशङ्खशूलब्रध्नरोगाः, पित्तगुल्मे ज्वरभ्रमदवथुपिपासागलतालुमुखशोषप्रमोहविड्भेदाश्च, कफगुल्मे कासश्वासप्रतिश्यायराजयक्ष्माणश्च (चनि. ४) असाध्यलक्षणम्–शूलाटोपान्त्रकूजनदौर्बल्यनखवैवर्ण्यारुचिहल्लासकासातिज्वरतृष्णातन्द्राप्रतिश्यायसहितो गुल्मो न सिध्यति (चचि. ५.१६९–१७१) गुल्म-रक्तगुल्मयोर्भेदः–गुल्मस्य पाको नास्ति। स त्वप्सु बुद्बुदवच्चयं याति। रक्तजानां पाको भवति
(सुउ. ४२.६–७)

चिकित्सासूत्रम्–गुल्मेष्वात्ययिके कर्मणि वातचिकित्सितं प्रणयेत्। स्नेहस्वेदौ वातहरौ। स्नेहोपसंहितं च मृदुविरेचनं बस्तींश्चाम्ललवणमधुरांश्च रसान् युक्त्याऽवचारयेत् (चनि. ३.१६) रक्तगुल्मः शस्त्रसाध्यः, 'मासे व्यतीते दशमे चिकित्स्यः' (चचि. ५.१९)

गोळा. रक्तदुष्टीने होणारा विकार. हृदय व नाभी यांमध्ये इकडून तिकडे जाणारी किंवा स्थिर, लहान मोठी होणारी जी गाठ ती गुल्म. मनुष्य समुदाय, झाडांचा समुदाय यांना गुल्म म्हणतात. गुह्यते म्हणजे ज्याने वेष्टिला जातो तो गुल्म. **उत्पत्ति**–दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस झाल्यावर नानादिशांना जीव घेऊन पळणे, आक्रमण करणे, जिंकणे, धावणे, पोहणे, लंघन इत्यादी शरिराचा क्षोभ करणाऱ्या कर्मांनी लोकांना पूर्वी गुल्मोत्पत्ति झाली. **संप्राप्ति**–अनुचित आहार-विहारांनी प्रकुपित वातादी दोष बस्ति नाभि फासळ्यातील अवयव (फुफ्फुसे) हृदय यांत पाच प्रकारचे गाठीसारखे गुल्म उत्पन्न करतात. **प्रकार दोन** आतला व बाहेरचा. **लक्षणे**–

**आतला.** गुल्म–बस्ति, कुशी, हृदय, प्लीहा यात वेदना, अग्नि वर्ण बल यांचा भ्रंश, मळमूत्रादिवेग न येणे. **बाहेरचा**–गुल्मात कोष्ठ्यातील अवयवात थोडी वेदना, स्रोतसांचा वर्ण बिघडणे, ते बाहेर अधिक उचलून–उंच फुगून येणे. **पूर्वरूप**–अन्नाची अनिच्छा, रुचि नसणे, न पचणे, अग्नि अव्यवस्थित होणे, जेवण पचत असता छातीत जळजळ, ढेकर, वांती, वातमूत्रमळ यांचे विसर्जनाचे वेग न येणे, आले तर मळमूत्रवात थोडे होणे किंवा मुळीच न होणे. वात, शूल, गुडगुड, आंतड्यात बारीक आवाज होणे, झिणझिण्या येणे, लेंड्या होणे, भूक न लागणे, दुबळेपणा, पोट भरले तर ते सहन न होणे इ० **वातगुल्मलक्षण**–स्वतःच्या कारणांनी प्रकुपित वायु महास्रोतसात शिरून रूक्षत्वाने कठीण होऊन आतडीला व्यापून गोळा होऊन रहातो. तो नानाप्रकारच्या गाठी व शूल करतो. गुल्म मधून मधून फुगतो व कमी होतो. अनियमितपणे पुष्कळ किंवा थोड्या वेदना होतात. थोडा वेळ मुंग्या अंगावर चालल्या प्रमाणे, टोचणी, फूट, स्फुरण, तणावा (ताण) आकुंचन, स्पर्शनाश, रोमांच पुष्कळ येतात, नाहीसे होतात, तेव्हा रोग्याला सुई किंवा अंकुश कोणी खुपसतो आहे असे वाटते. सायंकाळी ताप येतो, तोंड सुकते, श्वास घेताना त्रास होतो, वेदना होत असताना रोमांच उभे राहतात. **पित्तगुल्म**–पित्त वातासह प्रकुपित होते. हृदय, ऊर, घसा यात ते जळजळ करते व धुराने युक्त जणु आंबट ढेकर आणते, गुल्माच्या पोकळींत आग धूर उष्णता वाटते, दुखते उकडल्यासारखे ओलसर व ढिले वाटते, स्पर्श सहन होत नाही, थोडे रोमांच होतात. हिरवी पिवळी त्वचा, नखे, डोळे, तोंड, मूत्र व मळ होतो. **कफगुल्म**–कफ वातासह प्रकुपित होतो. तो विशेषतः थंडीताप, अरुचि, अपचन, अंगदुखी, हृद्रोग, ओकारी, झोप, आळस, दडसपणा, जडपणा, डोके तापणे ही लक्षणे उत्पन्न करतो. त्वचा नखे इत्यादी पांढरी असतात. **संनिपातगुल्म**–त्रिदोष प्रकोपक कारणे व चिन्हे यात असतात. एकमेकाविरुद्ध उपचार करावे लागतात म्हणून हा असाध्य. **रक्तगुल्म**–स्त्रियांनाच हा होतो. तुरट, कडू, तिखट, मानवत नाही. **उपद्रव-वातगुल्मात**–प्लीहावृद्धि, गुडगुड, आतड्यांत बारीक शब्द (गुरगुर) अपचन, उलटे पोट फुगणे, अंग दुखी, मान डोळे कानशिळ यात शूळ, अंडवृद्धि. **पित्तगुल्मात**–ताप भ्रम डोळे इत्यादिकात तीव्र उष्णता वाटणे, तहान गळा टाळू तोंड सुकणे, मूर्च्छा येते आणि मळ भसरट होतो. कफज गुल्मात खोकला श्वास पडसे आणि क्षय. **असाध्य लक्षणे**–शूल, गुडगुड, गुरगुर, दुबळेपणा, नखाचा रंग बिघडणे, रुचिनाश, घशात येणे, खोकला, अतिशय तीव्र ज्वर, तहान, झापड, पडसे यानी युक्त गुल्म साध्य होत नाही. **गुल्म व रक्तगुल्म यातील भेद**–गुल्माचा पाक होत नाही तो पाण्यावर जसा बुडबुडा तसा आंतडी इत्यादीवर येतो. रक्तगुल्म पिकतो. **उपचार**–तीव्र स्वरूपात वातोपचार, वातहारक स्नेहन व शेक. स्नेहयुक्त मृदु रेचक, बस्ती, आंबट खारट गोड रस युक्तीने द्यावेत. रक्तगुल्म शस्त्राने साध्य. दहाव्या महिन्यात शस्त्रकर्म करावे.

**–केतु**–पु., वनस्पति० **अम्लवेतसः** (रा. ६.१४८) अम्लवेतस.

**–चिकित्सित**–न., अध्याय० (चचि. ५.१) अध्यायाचे नाव. यात गुल्माचे उपचार आहेत.

**–निदान**–न., अध्याय० (चनि. ३.१) अध्यायाचे नाव. यात गुल्माची माहिती आहे.

**–मूल**–न., वनस्पति० **आर्द्रकम्** (रा. ६.१३२) आले.

**–वल्ली**–स्त्री., वनस्पति० **सोमवल्ली** (रापरि. ३.३) सोमवल्ली.

**गुल्मक**–पु., वनस्पति० **करवीरः** (ध. ४.२) कण्हेर.

**गुल्मावकाश**–पु., **गुल्मस्यावकाशः स्थानं प्रदेशो वा** (चनि. ३.९)

गुल्माचे स्थान, प्रदेश.

**गुह**–पु., **कुमारः कार्तिकेयः गूहति रक्षति देवसेनामिति गुहः** (काचिबालग्रहचि.)

**रेवतीग्रहस्य भ्राता** (काचिबालग्रहचि.)

कार्तिकेय, बालग्रहांपैकी एक.

**(गुहा)**–स्त्री., वनस्पति० **पृश्निपर्णी** (ध. १.९०) (सुक. ८.५१३) पिठवण.

**शालिपर्णी** (रा. ४.११३) (सुक. ६.३ ड) सालवण.

**गुहा**–स्त्री., (ध. १.९०) गुहा.

**–शय**–वि., **गुहासु निवसन्त्यन्यः प्राणीः** (ध. परि. ६.६) **सिंहव्याघ्रवृकतरक्षृक्षद्वीपिमार्जारशृगालमृगेर्वारुकप्रभृतयः** (सुसू. ४६.७२–७३)

**गुणाः—मधुर उष्णः स्निग्धो गुरुर्बल्यो वातघ्नो गुह्यनेत्रविकारघ्नश्च** ( ध. परि. ६.६ )
गुहेत राहणारे प्राणी. सिंह, वाघ, लांडगा, बिबळ्या वाघ, अस्वल, चित्ता, रानमांजर, कोल्हा, तरस इत्यादी यांचे मांस गोड, उष्ण, स्निग्ध, जड, बलवर्धक वातनाशक, गुद, जननेंद्रिय, डोळे यांचे विकार नाशक.

**गुह्य**—न., **गुदं गुह्यं गोपनीयं वस्त्रादिना इति गुह्यं, तत्समीपभागो वा** ( अहसू. ५.५८ )
वस्त्रादिकांनी झाकावयाचा गुद किंवा त्याजवळचा भाग.

**—पत्र**—पु., **वनस्पति॰ पिप्पलः** ( ध. ५.७९ ) पिंपळ.

**-बीज**—पु., **वनस्पति॰ भूतृणम्** ( रा. ८.७३ ) रोहिस गवत.

**—रोग**—पु., **गुह्यभागे जायमाना उपदंशप्रदरादयो रोगाः** ( र. १२.–१८ )
**संप्राप्तिः संख्या च—मुष्टिदन्तनखोत्पीडादिभिर्दुष्टा दोषा गुह्यंगता उपदंशादीन् त्रयोविंशतिरोगान् जनयन्ति** ( असंउ. ३८ ) **ते च उपदंशोऽर्शः सर्षपिकावमन्थौ कुम्भिकाऽलज्युत्तमा पुष्करिका संव्यूढपिटिका मृदितमष्ठीलिका ग्रथितं निवृत्तमवपाटिका निरुद्धमणिः स्पर्शहानिः शतपोनकस्त्वक्पाकमांसपाकासृगर्बुदं मांसार्बुदं विद्रधिस्तिलकालका इत्यादयः** ( असंउ. ३८ ) **तत्र मांसार्बुदमांसपाकविद्रधितिलकाश्चत्वारोऽसाध्याः, शेषा एकोनविंशतिः शीघ्रमुपाचरिताः कृच्छ्रेण साध्याः** ( असंउ. ३८ )
गुह्य भागात होणारे गरमी प्रदर इत्यादी रोग. **संप्राप्ति संख्या**—मूठ, दात, नख यांच्या घासण्याने दुष्ट दोष गुह्य भागात गरमी इत्यादी २३ रोग करतात. नावे वर आहेत. त्यात मांसार्बुद, मांसपाक, विद्रधि, तिलकालक हे चार असाध्य. बाकीचे एकूणवीस प्रकार ताबडतोब उपचार केले तर कष्टाने साध्य होतात.

**—रोगप्रतिषेध**—पु., **अध्याय॰** ( अहउ. ३४ )
अध्यायाचे नाव. यात गुह्य रोगाचे उपचार आहेत.

**—विज्ञान**—न., **लक्षण॰ गुप्तस्य गूढस्य विज्ञानम्** ( सुउ. ६०.४ )
गुप्त किंवा गूढ विषयाचे ज्ञान.

**—वेदना**—स्त्री., **लक्षण॰ पायुवृषणमेहनानां शूलम्** ( अहसू. ४.१९ )
गुद, वृषण, शिश्न, योनि यातील शूळ.

**गुह्यक**—पु., **देवयोनि॰** ( चवि. ३.७ ( ३ )
देवयोनीतील एक.

**गूढ**—वि., **गुप्तम्** ( चशा. ८.५१ ) गुप्त.

**—पत्र**— पु., **वनस्पति॰ करीरः** ( ध. ५.९९ ) नेपती. **अङ्कोटः** ( रा. ९.३८३ ) अंकोल.

**—पुष्प**—पु., **वनस्पति॰ बकुलः** ( ध. ५.१५४ ) बकुळ. **सप्तपर्णः** ( ध. ३.८० ) सातवीण.

**—मल्लिका**—स्त्री., **वनस्पति॰ अङ्कोटः** ( रा. ९.३८३ ) अंकोल.

**—मूल**—वि., **भूमिगुप्तमूलः कन्दादिः** ( सुउ. ४२.५–६ )
कंद इत्यादी, जमिनीत ज्यांची मुळे गुप्त असतात ती.

**—मूलोदय**—वि., **गूढमूला गुप्तकारणात् उत्पत्तिर्यस्य** ( सुउ. ४२.५–६ )
ज्यांची उत्पत्ति गूढ आहे असे.

**—लिङ्ग**—वि., **अव्यक्तलक्षणो ( रोगः )** ( चवि. ४.८ )
ज्याची लक्षणे अव्यक्त आहेत तो.

**—संधि**—वि., **गुप्तः संधिर्यस्य सः दीर्घायुर्लक्षणेष्वेकं लक्षणम्** ( सुसू. ३५.५ )
ज्याचे सांधे वरून दिसत नाहीत, मांसाने झाकलेले असतात तो, दीर्घायुषी लक्षणातील एक.

**—सिर**—वि., **गुप्ताः सिरा यस्य सः दीर्घायुर्लक्षणानामन्यतमम्** ( सुसू. ३५.५ )
ज्याच्या शिरा गुप्त आहेत. वरून दिसत नाहीत तो, हे दीर्घायुष्याचे एक लक्षण.

**—स्नायु**—वि., **गूढाः स्नायवो यस्य सः दीर्घायुर्लक्षणानामन्यतमम्** ( सुसू. ३५.५ )
ज्याचे स्नायु गुप्त आहेत, वरून दिसत नाहीत तो. हे दीर्घायुष्याचे एक लक्षण.

**गूढास्थिसंधि**—वि., **गुप्तास्थिसंधिः** ( सुसू. ३५.१६ )
मांसात लपलेली हाडे व सांधे ज्याचे तो.

**गृञ्ज**—पु., **समण्डयवौदनः** ( चचि. २०.२८ )
पातळ किंवा आसट शिजवलेल्या जवाचा भात.

**गृञ्जन**—न., **वनस्पति॰ मूलकविशेषः तस्य गुणाः—तिक्तं कटूष्णं गुरु दुर्गन्धि कटुविपाकि रुच्यं दीपनं हृद्यं कफवातघ्नं गुल्मघ्नम्** ( ध. ४.३७ )
**गाजर**—कडु, तिखट, उष्ण, जड, दुर्गंधि, पचनानंतर तिखट, रुचकर, अग्निदीपक, हृदयाला हिताचे, कफवातनाशक, गुल्मनाशक.
**रक्तमूलकम्** ( चक. १.२५ ) लाल मुळा.
**लशुनः** ( ध. ४.६६ ) लसूण.
**रसोनभेदः** ( सुउ. ५६.१४ ) लसुणाचा प्रकार.

**गृञ्जनक**–न., शाक० रसोनकसदृशं शोभाञ्जनं वा (चचि. १२.६३)
लसुणासारखी भाजी किंवा शेवगा.
**पलाण्डुभेदः** ( चचि. १४.२०२ )
**लोहितपलाण्डुः** ( चचि. १७.१३१ )
**स्वल्पनालपत्रः पलाण्डुः, अयं ग्राही तीक्ष्णो वातश्लेष्मार्शःसु हितोऽपित्तिनां स्वेदनाभ्यवहारार्थे हितः** ( चसू. २७.१७४ ) द्र० ' पलाण्डु '
कांद्याचा प्रकार. तांवडा कांदा. लहान नाळ व पाने असलेला कांदा. हा मळ घट्ट करणारा, तीक्ष्ण, वात–कफापासून झालेल्या मूळव्याधीला हितकर. पित्तप्रकृति नसलेल्यांना शेकण्यास, खाण्यास हितकर. पहा ' पलाण्डु. '

**गृद्धि**–स्त्री., गर्धनम्, अभिलाषः ( रसेषु ) ( चचि. १५.६२ )
इच्छा, अभिलाषा.

**गृध्नु**–वि., लुब्धः, लोलुपः ( चनि. ४.५० )
लुब्ध, लोलुप.

**गृध्र**–पु., पक्षि० गृध्यति अभिकांक्षति मांसमिति गृध्रः, प्रसहवर्गीयः ( धपरि. ६.१४ ) प्रतुदवर्गीयः ( रापरि. ७.३ ) वातप्रकृतिकः मांसाशी ( सुशा. ४.६७ ) **अयं योजनदृष्टिः** ( सुसू. ४६.७४; ) **अस्य मांसं शोषिणे बृंहणार्थं देयम्** ( सुसू. ४१.३६ ) **गुणाः–मधुर उष्णः स्निग्धः सन्तर्पणो बल्यः पित्तकरो दाहरक्तपित्तहेतुर्विशोषोन्मादशुक्रक्षयभस्मकादिरोगहेतुः** ( धपरि. ६.१४ ) **तस्य पुरीषं पक्वशोथस्य दारणं करोति** ( सुसू. ३७.१० ) **श्लेष्मार्बुदे प्रलेपार्थमुपयुज्यते** ( असंउ. ३५ ) **वसा तिमिररोगेष्वञ्जनार्थमुपयुज्यते** ( सुउ. १७.३५ )
गिधाड. भक्ष्यावर आक्रमण करून भक्ष्य खाणाऱ्या वर्गातील. वातप्रकृति. मांसाहारी. चारकोस अंतराइतकी लांब दृष्टि. याचे मांस क्षयाला पौष्टिक म्हणून देतात. **गुण**–गोड, उष्ण, स्निग्ध, पौष्टिक, बलवर्धक, पित्तकर, रक्तपित्त, उन्माद, शुक्रक्षय, भस्मकरोग करणारे. **मळ**–पिकलेली सूज फोडतो. कफार्बुदावर लेपाकरिता. **चरबी**–दृष्टिरोगात अंजनाकरिता.

**–क्षार**–पु., विषदिग्धविद्धे प्रतिसारणार्थमुपयोज्यः ( असंउ. ४० )
गिधाडाचा क्षार. विषारी शस्त्राने झालेल्या जखमेवर चोपडण्यास.

**–गन्धित्व**–न., शुष्करेवतीलक्षण० ( असंउ. ३ )
गिधाडासारखी घाण. शुष्करेवतीबाधा बालकास असताना असा वास येतो.

**–नखी**–स्त्री., वनस्पति० बदरी ( ३८.७३ ) बोर.

**–पत्रा**–स्त्री., वनस्पति० धूम्रपत्रा ( रापरि. ५.८ )
धूसर रंगाची पाने असलेली कृमिनाशक व स्त्रियांचे मल शोधन करणारी.

**–मुखयन्त्र**–न., स्वस्तिकयन्त्र० गृध्रमुखसदृशं यन्त्रम् ( सुसू. ७.१० )
एक स्वस्तिक यंत्र. ज्याचे तोंड गिधाडाच्या चोचीसारखे असते.

**गृध्रसी**–स्त्री., रोग० अशीतिवातविकारेष्वेकः ( चसू. २०.११ )
**संप्राप्तिः–प्रकुपितो वायुः सक्थ्नः कण्डरामाश्रित्य सक्थ्नः क्षेपं निगृह्णाति** ( सुनि. १.७४ ) **वातेन वातश्लेष्मोद्भवेन गृध्रसी द्विधा** ( चचि. २८.५७ ) **रूपम्–सक्थ्नः क्षेपनिग्रहणं स्तम्भरुक्तोदादिलक्षणं क्रमात् स्फिक्कटिपृष्ठोरुजानुजङ्घापददेशेषु भवति** ( चचि. २८.५६ )
**तत्र वातजगृध्रसीलक्षणम्–जानुकटयूरुसंधीनां स्फुरणं स्तब्धता तोदश्च** ( मा. ) **वातश्लेष्मजगृध्रसीलक्षणानि–तन्द्रा गौरवं वह्निमार्दवं भक्तद्वेषश्च** (मा.)
ऐंशी वातविकारातील एक. यात ढुंगण, कंबर व पाठ अशी वर व ढुंगण, मांडी, गुडघा, जांघ, घोटा, पाय ( टांच ) अशी खाली क्रमाने चमक होते व पाय ताठरतो; चालण्याला हालवण्याला अडचण होते. जेव्हा ताठरपणा, फुरफुरणे आणि वेदना अधिक तेव्हा वातज गृध्रसी; झापड, जडपणा, अग्निमांद्य व अन्नद्वेष अधिक तेव्हा वातकफज गृध्रसी समजावी.

**गृध्राणी**–स्त्री., वनस्पति० धूम्रपत्रा ( रा. परि. ५.८ )
पहा ' गृध्रपत्रा. '

**गृष्टि**–स्त्री., वनस्पति० काश्मरी ( रा. ९.१४७ ) शिवण.
**वाराहीकन्दः** ( ध. ४.९२ ) डुक्करकंद.
**एकवारप्रसूता गौः** ( चचि. ९.४३ ) **सकृद् एकवारं गर्भं गृह्णाति इति गृष्टिः**
एक वेळा प्रसूत झालेली गाय.

**गृष्टिका**–स्त्री., वनस्पति० वाराहीकन्दः ( ध. ४.९२ )
डुक्करकंद.

**गृह**–न., निवासस्थानम् ( चशा. १.४३ )
घर, राहाण्याचे ठिकाण.

**–कन्या**–स्त्री., वनस्पति० कुमारी ( र. ११.३१–३२ ) ( रापरि. ५.१० )
कोरफड.

**-कपोत**-पु., पारावतः ( असंउ. ४३ )
पारवा, कबुतर.

**-कार**-पु., गृहं करोति रचयति, सः ( चशा. १.४३ )
घर करतो-रचतो तो, घर बांधणारा.

**-कुक्कुट**-पु., ग्राम्यकुक्कुटः ( सुचि. ९.१९ )
गांवातला कोंबडा.

**-कुलिङ्ग**-पु., प्रतुदपक्षि०, पुण्ड्रचटकः ग्रामचटको वा ( सुसू. ४६.६७ ) गांवठी चिमणा.

**-गोधिका**-स्त्री., प्राणि० पल्ली ( मा. ) तस्या दंशलक्षणानि-स्वेदस्तोदः श्वयथुर्दाहः हृत्पीडा ग्रन्थिसंभवश्च ( चचि. २३.१५६ ) ( असंउ. ४३ )
**पाल चावल्याची लक्षणे**-घाम, टोचणी, सूज, दाह, हृदयात वेदना व गांठी होतात.
**वरमठीकृतं मृण्मयं गृहमुपचारात् लक्षणया गृहगोधिकेत्युच्यते, इदं पयसि निर्वापितं पीतं च छर्दिशमनम्** ( सुउ. ४९.३१ )
कुंभारीण माशी. मातीची घरे करते. ही माती तापवून पाण्यात विझवून ते पाणी प्याल्यास ओकारी नष्ट करते.

**-गोपिक**-स्त्री., प्राणि० पल्ली, गृहगोधिका ( सुउ. १८.९४-९७ ) पाल.

**-गोलिका**-स्त्री., प्राणि० पल्ली, गृहगोधिका ( असंउ. ४३ ) पाल.

**-द्रुम**-पु., वनस्पति० शाकः गृहनिर्माणोपयोगिदारुविशिष्टत्वादयं गृहद्रुम इति सुष्ठु व्यपदिश्यते ( रापरि. ९.६ ) साग.

**-धूप**-पु., धूपकल्प० ( काकल्प १. )
घरात करावयाचा-द्यावयाचा धूप.

**-धूप**-पु., आगारधूमः ( चसू. ३.५ )
**गृहे महानसादौ भित्त्युपरि संचितो धूमः** ( चचि. ७.८७ ) घेरोसा.

**गृहीतगर्भा**-वि., लब्धगर्भा ( सुशा. ४.२४ )
गरोदर स्त्री, गर्भिणी.

**गेयप्रिय**-पु., वनस्पति० मुद्गरः ( रापरि. १०.२२ )
सात पानांचा वाटोळ्या अति सुगंधी फुलांचा व सुगंधी नाराचा वृक्ष.

**गेहधूम**-पु., गृहधूमः ( र. २२.१५८ ) घेरोसा.

**गैरिक**-न., खनिज० **गिरौ पर्वते भवति इति गैरिकम्, मृत्तिकाभेदः** ( चसू. १.७० )
**शोणितास्थापनगणे** ( चसू. ४.१८ )
**गैरिकम्, पाषाणगैरिकं च, तत्र सुवर्णगैरिकं स्निग्धं शोणितवर्णं च पाषाणगैरिकं कठिनं ताम्रवर्णकम् । गुणाः-सुवर्णगैरिकं मधुरं स्निग्धं नेत्र्यं कषायं रक्तपित्तघ्नं हिध्मावमिविषघ्नं च पाषाणगैरिकमपि एतद्गुणयुक्तं परं तत्र मात्राऽल्पीयसी, गवां दुग्धैर्भावितं गैरिकं शुद्धिमाप्नोति । गैरिकं तु स्वयमेव सत्त्वरूपं भवति । अतस्तस्य सत्त्वपातनस्यावश्यकता नास्तीति नन्दिमतं वाग्भटसंमतम्, एतद्विषये मतान्तरम क्षारत्रवक्षारादयोऽम्ला जम्बीरादयस्तैः स्विन्नाद्गैरिकात्सत्त्वं बहिरागच्छेत् । गैरिकसत्त्वं लोहमेव भवतीति वृद्धसंकेतः** ( र. ३.५३ )
**पारदकर्मण्युपयुक्तेष्वष्टोपरसेष्वेकं द्रव्यम्** ( र. ३.१ )
**विसर्पे** ( चचि. २१.८२ ) **कुष्ठे** ( चसू. ३.५ ) **च प्रदेहार्थं, रक्तपित्ते** ( चचि. ४.७३ ) **पिपासादाहशमनार्थं सम्यग्दग्धे** ( सुसू. १२.२३ ) **आलेपनार्थं सिरोत्पाते चाञ्जनार्थमुपयुज्यते** ( सुउ. १२.१७ )
गेरू; काव. मातीचा प्रकार. प्रकार दोन. ( १ ) सोनकाव. ( २ ) दगड्या काव. पहिला स्निग्ध, मऊ, रक्ताच्या वर्णाचा व दुसरा कठीण, रूक्ष, तांब्याच्या रंगाचा. **गुण**-पहिला तुरट, गोड, स्निग्ध, डोळ्याला हितकर, रक्तपित्त व उचकीनाशक. **दुसरा-गुण** हेच; मात्र सोनकावेच्या मानाने अल्प. **शुद्धि**-गाईच्या दुधाच्या भावनेने. **सत्व**-गैरिक स्वतः सत्वरूप गैरिक हे लोह आहे असे एक मत आहे तेव्हा सत्वाची जरूर नाही. असे एक मत, सत्व काढावे दुसरे मत. पारदाच्या क्रियात उपयुक्त. आठ उपरसांपैकी एक. दाह, तहाननाशक, कुष्ठ, विसर्प, जळालेल्यावर लावण्यास व सिरोत्पात या डोळ्याच्या विकारात अंजनाकरिता.
**खनिज० सुवर्णम्** ( रा. १३.१ ) सोने.

**( गैरिका )**-स्त्री., **खनिज० गैरिकं मृद्विशेषः** ( सुचि. २५.३८ ) काव-गेरू.

**गैरिकाक्ष**-पु., **वनस्पति०** जलमधूकः ( रा. ११.५९ )
पाण्यातील ज्येष्ठमध.

**गैरिकोदकप्रतीकाश**-वि., **गैरिकमिश्रजलवत् पाण्डुलोहितम्** ( सुसू. १४.२१ )
कावमिश्रित पाण्यासारखे पांढरट तांबडे रक्त.

**गो**-पु., स्त्री., **प्राणि० गच्छति प्राप्नोति प्राणिवर्गे श्रैष्ठ्यम् इति गौः** (चसू. २७.३५) **कफप्रकृतिः** (सुशा. ४.७६)

ग्राम्यपशूनामन्यतमः (सुसू. ४६.८५) गोदुग्धगुणाः—क्षीरवर्गेऽग्र्यम् (चसू. २५.३८) मधुरं रसपाकयोः शीतं स्निग्धं गुरु वातपित्तघ्नं जीवनीयं रसायनं रक्तपित्तहरमल्पाभिष्यन्दि च (सुसू. ४५.५०–५१) बल्यं हृद्यं मेध्यं पुंस्त्वकरमत्यन्तरुच्यं कान्तिकरमोजोवर्धकं श्वेतवर्णगवां वातघ्नं कृष्णानां पित्तघ्नं रक्तानां कफघ्नं च (ध. ६.१६४) दधिगुणाः—विपाके मधुरं स्निग्धं दीपनं बलवर्धनं रुच्यं वातापहं च (सुसू. ४५.६७–६८) ग्राहि (ध. ६.१९०) घृतगुणाः—सर्पिषामग्र्यम् (चसू. २५.३८) विपाके मधुरं वातपित्तघ्नं चक्षुष्यं बल्यं विषघ्नं च (सुसू. ४५.९७) शीतं हृद्यं मेध्यं दीपनं वृष्यं (ध. ६.१४६) तद्द्विविधम् क्षीरोत्थं दध्युत्थं च (सुचि. ३१.४. ड.) मांसगुणाः—मृगमांसेष्वहिततमम् (चसू. २५.३९) गुरु (चसू. ५.११) इदं केवलवातेषु पीनसविषमज्वरशुष्ककासश्रमात्यग्निमांसक्षयेषु हितम् (चसू. २७.७९) गोमूत्रगुणाः—मधुरं कृमिघ्नं कण्डूघ्नमुदरे हितम् (चसू. १.१०१) स्थौल्ये उपयुज्यमानेष्वेकं द्रव्यम् (सुसू. १५.३२) कुष्ठघ्नं (चसू. ३.१३) शिरोविरेचनं (सुसू. ३९.६) कटु तिक्तं सक्षारमुष्णं तीक्ष्णं लघु लेखनं सरं दीपनं मेध्यं पित्तकरं कफवातघ्नं त्वग्दोषहरं (ध. ६.४८८) पाचनं (असंसू. ६.१४३) शूलगुल्मोदरानाहघ्नं (सुसू. ४५.२२०) विरेकास्थापनादिषूपयुज्यते मूत्रप्रयोगसाध्येषु प्रयोजयेत् (सुसू. ४५.२२०–२२१) भेदि (असंसू. ६.१४३) गोपित्तगुणाः—कुष्ठादिषु प्रदेहार्थमुपयुज्यते (चसू. ३.६) इदमुन्मादे नस्यार्थेऽञ्जनार्थे चोपयुज्यते (चचि. ९.६७) एतत्सिद्धं तैलमपस्मारे पानाभ्यङ्गेषूपयुक्तम् (सुउ. ६१.२४–२५) सौराष्ट्रीसत्त्वपातनार्थमुपयुक्तम् (र. ३.७३) गोरोमगुणाः—धूपनार्थम् (काधूपकल्प. १) अस्यान्तर्धूमदग्धं भस्म हिक्काशमनार्थं क्षौद्रोपेतं लिह्यात् (सुउ. ५०.२०) शकृद्गुणाः—गोशकृद्रसः रक्तपित्ते उपयुक्तः (चचि. ४.६९) मूषकविषे उपयुक्तम् (सुक. ७.३८) अञ्जनद्रव्यपेषणार्थमुपयुज्यते (सुउ. १७.११–१२) शिरोविरेचनद्रव्येष्वेकम् (सुसू. ३९.६) वृश्चिकस्य तीक्ष्णमध्यविषे सुखोष्णं गोमयं स्वेदनार्थमुपयुज्यते (सुक. ८.६८–६९) शुष्कं गोमयं दाहार्थमुपयुज्यते (सुचि. ४.३०) गोर्वरं रससाधने श्रेष्ठम् (र. १०.५९) गोदन्तः—दहनकर्मण्युपयुज्यमानेषु द्रव्येष्वेकम् (सुसू. १२.४) कुष्ठे उद्दालनार्थमुपयुज्यते (चचि. ७.१६०)

गाय. गावठी प्राणी. गाईचे दूध, दुधाच्या वर्गात श्रेष्ठ. कफप्रकृति आहे. **गुण**—गोड, पचल्यावर गोड, थंड, स्निग्ध, जड, वातपित्तनाशक, जीवनाला पुरेसे, सर्वधातुपरिपोषक, रक्तपित्तहर, आर्द्रता थोडी वाढविणारे, बलवर्धक, हृदयाला—धारणाशक्तीला शुक्रधातूला हितकर, अतिरुचकर. ओज व कांतिवर्धक; **पांढऱ्या गाईचे वातघ्न, काळीचे पित्तघ्न** व **तांबडीचे कफघ्न. दह्याचे गुण**—पचनानंतर गोड, स्निग्ध, अग्निदीपक, रुचकर, वातहर व बलवर्धक. **तूप**—सर्व प्रकारच्या तुपांमध्ये गाईचे तूप श्रेष्ठ. पचनानंतर गोड, वातपित्तघ्न, शुक्रधातु, धारणाशक्ति व डोळ्याला हितकर, बलकर, विषघ्न, थंड व अग्निदीपक. तुपाचे प्रकार दोन, दुधातून काढलेले व दह्याचे ताक करताना दह्यातून येणारे लोणी व त्याचे केलेले तूप असे प्रकार प्रचलित आहेत. **मांसगुण**—मृगजातीच्या सर्व मांसात गोमांस अहितकर आहे. केवळ वात, पडसे, विषमज्वर, सुका खोकला, थकवा, मांसाचा क्षय यावर उपयुक्त. **गोमूत्राचे गुण**—गोड, कडू, तिखट, क्षारयुक्त, उष्ण, तीक्ष्ण, लघु, सारक, अग्निदीपक, पित्तकर, कफवातहर, कृमि, खाजनाशक, उदरावर हितकर, स्थूलता, कुष्ठ, त्वग्दोष, शूल, गुल्म, पोटफुगी कमी करणारे, विरेचन, आस्थापन बस्ति इत्यादींमध्ये उपयुक्त. मूत्रप्रयोगात उपयुक्त. **गाईचे पित्त**—कुष्ठादिकांवर लेप, उन्मादावर नस्य अंजन अपस्मारावर याने सिद्ध तेल पिणे व अभ्यंग यात उपयुक्त. तुरटीच्या सत्वपातनाकरिता उपयुक्त. **गाईचे केस**-धूप देण्यास—अंतर्धूम भस्म, मधाबरोबर उचकी करता चाटण. **शेण**—शेणाचा रस रक्तपित्तात उंदराच्या विषात उपयुक्त. बारीक वाटून अंजन करण्यासाठी योग्य असे हे द्रव्य आहे. डोके शुद्ध करण्याकरता, नाकात घालावयाच्या द्रव्यांपैकी एक. विंचवाच्या तीव्र व मध्यम विषात गाईचे शेण कोमट करून शेकण्याकरिता उपयोगी. **सुकलेले शेण,** दाहनाशक, रसक्रियेत उपयुक्त. **गाईचा दात**—डाग देण्यास उपयुक्त द्रव्यातील एक. कुष्ठात उटण्याकरिता.

**पृथिवी** ( अहसू. १०.१ ) पृथ्वी.
**वनस्पति० ऋषभः** ( रा. ५.१५८ )
जीवनीय गणांपैकी एक.
**–कण्ट**–पु., **वनस्पति० गोक्षुरः** ( ध. १.१०३ )
गोखरू.
**–कण्टक**–पु., **वनस्पति० गोक्षुरः** ( ध. १.१०२ )
गोखरू.
**वनस्पति० क्षुद्रकण्टकः** ( रा. ३.१३१ ) रिंगणी.
**विकण्टकः** ( रापरि. ११.१९ )
पावसाळ्याच्या आरंभी येणाऱ्या मऊ फळांचा वृक्ष.
**–कर्ण**–पु., **प्राणि० गोमुखहरिणः** ( चसू. २७.४७ )
**गोकर्णसदृशकर्णः कूलचरपशुः ' गोन ' इति प्रसिद्धः ( डल्हण ) गोकर्णसदृशकर्णो रासभाकारः ( हे )**
**मांसगुणाः–मधुरं स्निग्धं मृदु कफावहं रक्तपित्तघ्नं विपाके मधुरं च** ( सुसू. ४६.१०४ )
गाईच्या तोंडासारखे तोंड व कानासारखे कान असलेला हरिण. गाढवासारखा आकार असलेला हरिण. **मांसगुण**–गोड, पचल्यावर गोड, मऊ, स्निग्ध, कफकर, रक्तपित्तनाशक.
**–( कर्णी )**–स्त्री., **वनस्पति० मूर्वा** ( रा. ३.१० )
मोरवेल.
**–क्षुर**–पु., **वनस्पति० श्वयथुहरगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१६ ) **मूत्रविरेचनगणे एकः** ( चसू. ४.१५ ) ( चसू. २५.४० ) **गुणाः–**
**मधुरः शीतो मधुरविपाकी बृंहणो वृष्यो दीपनस्त्रिदोषघ्नो रसायनः शूलहृद्रोगमूत्रकृच्छ्रप्रमेहाश्मरीदाहनाशनश्च** ( ध. १.१०२ )
हिं.—गोखरू.
**म.—गोखरू.**
बं.—गोखरी.
त.—नैरिंची.
फा.—तुखमेखार.
गोखरू. मूत्रविरेचक व सूजनाशक गणातले एक द्रव्य. **गुण**–गोड, पचनानंतर गोड, थंड, त्रिदोषहर, शुक्रधातूला हितकर, पौष्टिक सर्व धातूंना परिपोषक, कष्टाने लघ्वी होणे, मूतखडा, प्रमेह, दाह, शूल, हृदयाचे रोगनाशक.
**–क्षुरक**–पु., **वनस्पति० गोक्षुरः** ( ध. १.१०२ )
गोखरू.
**–क्ष्वेड**–पु., **पक्षि० प्रतुदवर्गे गोनर्दपक्षी** (असंसू. ७)
टोचून भक्ष्य खाणारा एक पक्षी.
**–क्ष्वेडक**–पु., **प्रतुदपक्षि० गोनर्दः** ( ड ) **'घोडाकङ्क' इति ख्यातः** ( च ) ( सुसू. ४६.६७ )
टोचून भक्ष्य खाणारा एक पक्षी.
**–चन्दना**–स्त्री., **वनस्पति० प्रियङ्गुः** ( सुचि. २८.२२ ) गव्हला.
**सविषजलौका० इयं गोवृषणवदधोभागे द्विधाभूताकृतिरणुमुखी** ( सुसू. १३.११ )
विषारी जळू. बैलाच्या वृषणासारखी खालच्या भागी दोन भाग झाल्यासारखी दिसते व तोंड लहान असते.
**–चर**–पु., **शब्दादिको विषयः** ( चशा. १.३१ )
कर्ण इ. इंद्रियाचे शब्दादि विषय.
**गवां संचारस्थानम्, गावश्चरन्ति तृणादि भक्षयन्ति अस्मिन्निति** ( चसू. २७.३११ )
गायरान. गाई जेथे चरतात ते स्थान.
**–चरविभ्रम**–पु., **इन्द्रियार्थविभ्रमः** ( सुउ. ७.१० )
इंद्रियाच्या शब्दादि विषयांचा विभ्रम. डोळ्याला दूरचे जवळ, जवळचे दूर दिसते. नसेल ते दिसते, आहे ते दिसत नाही.
**–चर्मन्**–न., **गोचर्माख्यं मानम् इदं भूमिमानम्** ( कोवि. ३ )
**'सप्तहस्तेन दण्डेन त्रिंशद्दण्डैर्निवर्तनम् । दश तान्येव गोचर्म' ( इति शब्दकल्पद्रुमः )**
जमिनीचे मापन. दोन हजार शंभर हात.
**–जल**–न., **गोमूत्रम्** ( सुउ. ४४.३४ ) गोमूत्र.
**–जा**–स्त्री., **वनस्पति० गोलोमिका** ( रापरि. ५.३२ )
एक वनस्पती.
**–जापर्णी**–स्त्री., **वनस्पति० दुग्धफेनी** ( रापरि. ५.३४ )
एक दुधाळ वनस्पती.
**–जिह्वा**–स्त्री., **वनस्पति० गवेधुका** ( रा. ४.१८० )
गाईच्या जिभेसारखी खरखरीत पाने असलेली फुले खाली जमिनीकडे तोंड असलेली वनस्पती.
**शाक० दार्विपत्रिका, मण्डूकपर्ण्यादिगणे** ( चसू. २७.९७ )
**चतुष्पादिकृतनखदन्तक्षते विषशमनार्थमुपयुक्ता** ( चचि. २३.२२० )
**गुणाः–कषायमधुरा स्वादुपाका शीता लघ्वी पित्तघ्नी च** ( सुसू. ४६.२६४ )
एक भाजी. चतुष्पाद इत्यादी प्राण्यांच्या दांत नखे यानी झालेल्या जखमेतील विषनाशक. **गुण**–तुरट, गोड, पचनानंतर गोड, थंड, हलकी, पित्तनाशक.

**–जिह्विका**–स्त्री., शारीर० **गौर्वाक् वचनकारणभूता प्रधानजिह्वा** ( चशा. ७.११ )
बोलण्याचे काम करणारी जीभ, मुख्य जीभ.

**–जीर्णक**–पु., **संस्कृता यवा, धेनुना खादिता यवा, द्वितीयदिने तच्छकृति लब्धाः कुष्ठप्रयोगेषूपयुज्यते** ( असंचि. २१ )
गाईच्या शेणातील जव. गाईने खाल्लेले दुसऱ्या दिवशी तिच्या शेणात सांपडलेले. कुष्ठ व प्रमेहात योजतात.

**–तीर्थ**–न., **सलिलगोपथः, रेवतिबलिनिवेदनस्थानम्** ( सुउ. ३१.९ )
गाईचा पाणोथा. रेवतीग्रहाचा बळी–नैवेद्य ठेवण्याचे ठिकाण.

**–तीर्थक**–पु., छेद० ( सुचि. ८.१० ) '**पार्श्वगतेन शस्त्रेण छेदः**' ( असंउ. ३३ ) **एतद्विषये मतत्रयम् गच्छतो गोर्मूत्रगतिसदृशोऽथवा गोतीर्थं गोयोनिस्तदाकारोऽथवा गोतीर्थं निपानं येन गावः पिबन्ति तत्खुराङ्कितवच्छेदविशेषः** ( सुचि. ८.१० )
सरळ छेद घेताना शस्त्र बाजूला नेऊन छेद घेणे. गाय चालताना मुतते तेव्हा जमिनीवर जी नागमोडी रेषा दिसते तसा किंवा गाईच्या योनीच्या आकाराचा किंवा गाईच्या खुराच्या ठशातल्या आकृतीसारखा छेद घेणे.

**–त्र**– न.; **कुलम्** ( सुचि. २४.६८ ) कुल.
**शरीरम्** ( सुचि. २४.६८ ) शरीर.

**–दन्त**–पु., भैषज्य०, **गोर्दन्तः** ( चचि. २३.२०३ )
गाईचा दात.

**–दन्तमसी**–स्त्री,; **गोदन्तस्य भस्म, अञ्जनार्थमुपयुज्यते** ( सुउ. १७.६८ )
गाईच्या दाताची मषी. डोळयात अंजनाकरिता उपयुक्त.
खनिज० **हरितालम्** ( ध. ७.११९ ) हरताळ.

**–नर्द**–न., वनस्पति० **परिपेलम्** ( **तृणविशेषः** ) ( अहसू. १५.२६ ) एक गवत.
पक्षि० **बकः** ( चचि. १२.२४ ) बगळा, सारस.
**श्वेतवर्णकङ्कः** ( चसू. २७.४९ )
एक पक्षी. याची पिसे बाणाला लावतात.
**गोक्ष्वेडः** ( अहसू. ६.४५ )
जमीन विखरून भक्ष्य वेचणारा एक पक्षी.

**–नस**–पु., सर्प० **मण्डलिसर्पः** ( सुक ४.३२ ( २ ) **यदाऽसौ स्थविरस्तदा दृष्टिनिःश्वासविषो भवति** ( चचि, २३.१३६ )
मंडली जातीचा सर्प. जेव्हा हा म्हातारा होतो तेव्हा याच्या दृष्टीत व निःश्वासात विष असते. घोणस.
खनिज० **वैक्रान्त** ( ध. ६.४४ ) वैक्रांत.

( **–नसी** )–स्त्री., वनस्पति० **सोमसमवीर्या** ( सुचि. ३०.५ ) **इयं द्विपर्णिनी मूलभवाऽरुणा कृष्णमण्डला व्यरत्निप्रमाणा गोनसाकृतिश्च** ( सुचि. ३०.११–१२ ) **काश्मीरेषु क्षुद्रकमानससरसि वसन्ते वर्षायां च जायते** ( सुचि. ३०.३२–३४ )
सोमाच्या वीर्यासारखी वनस्पती. ही दोन पानांची, तांबूस, काळी मंडले असलेली, दोन हातापेक्षा थोडी कमी लांबीची घोणसे सारखी दिसणारी. काश्मीरमध्ये लहान मानस सरोवरात वसंत व वर्षाऋतूत होणारी.

**–नास**–पु., खनिज० **वैक्रान्तम्** ( रा. १३.५० )
तोरमल्ली.

**–पति**–पु., वनस्पति० **ऋषभः** ( ध. १.१२५ )
जीवनाकरिता उत्तम वनस्पतीपैकी एक.

**–पाल**–पु., **गोमहिष्यजादिपालकः** ( सुसू. ३६.१० )
गोपाल, गुराखी.

( **–पाली** )–स्त्री., वनस्पति० **गोपालकर्कटी** ( रा. ३.२६४ )
गोपाळकाकडी, अगदी लहान काकडी.
**गोरक्षी** ( रा.परि. ५.३० )
पाच पानांची व चांगल्या लांब पेऱ्यांची, सापासारखी पट्टे व ठिपके असलेली फार वास असलेली वनस्पती, रक्तदुष्टिनाशक.

**–पालकर्कटी**–स्त्री., वनस्पति० **त्रपुसविशेषः, तद्गुणाः–मधुरा शीता पित्तघ्नी मूत्रकृच्छ्राश्मरीमेहदाहशोषघ्नी** ( रा. ३.२६४ )
अगदी लहान काकडी. **गुण**–गोड, थंड, पित्तनाशक, प्रमेह, मूतखडा, लघवीला त्रास होणे, दाह, शोषनाशक.

**–पित्त**–न., भैषज्य० **गोरोचना** ( असंसू. ८ )
गोरोचन.

**–पुट**–न., वनस्पति० **परिपल्लम्** ( रा. ८.१०५; ध. ३. ५५ )
पांढऱ्या फुलाची सुगंधी; जीर्ण फुले व बुंधाही उपयुक्त. कांतिवर्धक.

( **–पुटा** ) स्त्री., **भद्रैला** ( रा. ६.७१ )
मोठी वेलची,

**–पुर**–न., देवालयद्वारम् ( असंउ. ४ )
देवालयाचा दरवाजा.

**–पुरक**–पु., वनस्पति० कुन्दुरुः ( ध. ३.१३१ )
फार व तीक्ष्ण वास असलेली वनस्पती.

**–पुररक्षित**–पु., धन्वन्तरिशिष्येष्वेकः ( सुसू. १.३ )
केचित्तु 'गोपुररक्षितौ' इति नामद्वयं मन्यते
( सुसू. १.३ )
एक धन्वंतरि शिष्य. काहींच्या मते गोपुर व रक्षित हे दोन.

**–पुरीषाग्नि**–पु., गोमयाग्निः ( चचि. १५.१७७ )
गाईच्या शेण्यांचा विस्तव.

**–मक्षिका**–प्राणि० गोशरीरे स्वभावादेव निवसन्ती मक्षिका ( र. २४.१० )
गाईच्या शरिरावर स्वाभाविक राहाणाऱ्या माशा.

**–मती**–स्त्री., वनस्पति० गोरोचना ( ध. ३.२० )
गोरोचन.

**–मत्स्य**–पु., नादेयो नदीभवो मत्स्यः
( सुसू. ४६.११३–११४ )
नदीतला मासा.

**–मयचूर्णप्रकाश**–पु., गोपुरीषचूर्णवत् प्रकाशो वर्णो यस्य, तस्य रजस उत्तमाङ्गे दर्शनम्, इदं मासिकमरिष्टमित्यवगन्तव्यम् ( सुसू. ३२.४ )
गाईच्या शेणीच्या चूर्णासारखा रंग–तोंडावर तसा रंग दिसणें हे महिन्यात मरणार असल्याचे चिन्ह.

**–मयचूर्णाभ**–वि., गोमयचूर्णसदृशम्, मूर्ध्नि एतस्योत्पत्तिररिष्टत्वेन मासान्तजीवनसूचिका
( चइ. १२.३ )
गाईच्या शेणाच्या चूर्णासारखे. तोंडावर जर असे दिसले तर महिनाभर आयुष्य समजावे.

**–मयचूर्णीय**–वि., अध्याय० ( चइ. १२.१ )
अध्यायाचे नाव.

**–मांसमसी**–स्त्री., गोमांसस्य क्षारः (सुचि. १७.३८)
गाईच्या मांसाची मषी.

**–मातृ**–स्त्री., जातहारिणी प्रसक्ता गोमाता, या गोपालस्य प्रजां हन्ति ( कारेवतीकल्प १५.१६ )
गवळ्यांची संतति मारणारी.

**–मायु**–पु., जम्बूकः, वातप्रकृतिरयम् ( सुशा. ४.६७ )
गां विकृतां वाचं मिनोति प्रक्षिपति इति गोमायुः
कोल्हा, वात प्रकृतीचा.

**–मुख**–पु., ऋषि० रससिद्धिप्रदायकेष्वेकः
( र. १.२–५ )
पारदकर्मात सिद्धि प्राप्त झालेल्यातला एक ऋषि.

**–मूत्रिका**–स्त्री., वनस्पति० गुणाः–मधुरा, वृष्या, गोदुग्धदायिनी च ( रा. परि. ८.४८ )
काळ्या जमिनीत होणारी तांबड्या गवतासारखी गोमूत्रासारखा वास असणारी वनस्पती. **गुण**–मधुर पौष्टिक असून गाईला दूध आणते.

**–मेद**–न., रत्न० ( चसू. २३.१५ ) गोमेदसमानवर्णत्वादेतद्रत्नं गोमेदमुच्यते, श्रेष्ठगोमेदलक्षणम्–निर्मलगोमूत्रसमानवर्णं निर्मलं स्निग्धं सर्वतः समानाकारं भारेण गुरु दलरहितं मसृणं प्रकाशयुक्तं गोमेदं ग्राह्यम्। यत्तु विगतच्छायं लघु रूक्षं चिपिटाकारं पटलान्वितपत्रयुक्तं दीप्तिरहितं पीतवर्णं काचसदृशाभं तत् त्याज्यं भवति। गुणाः–दीपनं पाचनं रुच्यं त्वच्यं मेध्यं कफपित्तक्षयपाण्डुनाशकं वर्तते ( र. ४.५७–६० )
गोमेद. रत्न. गाईच्या मेदासारखे रत्न. रंगाने स्वच्छ, गोमूत्रासारखे निर्मळ, स्निग्ध, सर्व बाजूनी सारख्या आकाराचे, वजनाने जड, पापुद्रे नसलेले, चिकण, प्रकाशयुक्त, **रत्न उत्तम.** ज्यात प्रतिबिंब दिसत नाही, हलके, रूक्ष, चापट, पदरयुक्त, चमकरहित, पिवळ्या काचेसारखे त्याज्य. **गुण**–अग्निदीपक, पाचक, रुचि निर्माण करणारे, त्वचेला व धारणाशक्तीला हितकर, कफपित्त, क्षय व पांडुनाशक.
**लोहितो पीतो वाऽयम् मणिः ( ड ) ( सुनि. ३.७ )**
**पुष्परागाभो मणिः कलुषजलस्य प्रसादनकरः**
( सुसू. ४५.१७ )
तांबडा किंवा पिवळा हा मणी ( पुष्परागाच्या रंगासारखा )–गढूळ पाणी स्वच्छ करतो.

**–यान**–न., गोवाह्यशकटः ( सुसू. २९.२४ )
बैलगाडी.

**–रक्ष**–पु., वनस्पति० ऋषभः ( रा. ५.१२८ )
जीवन चालविणाऱ्या वनस्पतींपैकी काश्मीरमध्ये उपलब्ध.

( **–रक्षी** )–स्त्री., वनस्पति० गुणाः–मधुरा तिक्ता शीता पित्तनाशिनी दाहविस्फोटवान्त्यतीसारज्वरदोषविनाशिनी ( रा. परि. ५.३० )
पहा गोपाली–गोरक्षी–**गुण**–गोड, कडु, थंड, पित्तनाशक, दाह, जळाल्यासारखे फोड, वांती, अतिसार, तापनाशक.
**गोरक्षदुग्धी** ( रा. परि. ५.५३ )
पुष्कळ पानांची तांबूस दुधाची. मेलेली असे वाटल्यानंतर ही जिवंत होणारी.

**–रक्षकर्कटी**–स्त्री., वनस्पति० **चिर्भटम्** ( ध. १.१८० ) चिभडे.

**–रक्षतुम्बी**–स्त्री., वनस्पति० **कुम्भतुम्बी** ( रा. ७.२३६ ) एक वनस्पती.

**–रक्षदुग्धी**–स्त्री., वनस्पति० **गुणाः–मधुरा शीता वृष्या ग्राहिणी रसे सिद्धिगुणप्रदा** ( रापरि. ५.५३ ) पहा 'गोरक्षी' गोरक्षदुग्धी–**गुण**–थंड, शुक्रास हितकर, मळ बांधणारी व पाऱ्याच्या क्रियेत उपयुक्त.

**–रङ्कु**–पु., वनस्पति० **जलमधूकः** ( ध. ५.४९ ) पाण्यातील ज्येष्ठमध.

**–रथ**–पु., **गोशकटम्** ( चइ. १२.८६ ) बैलगाडी.

**–रस**–पु., **गोर्निष्पन्नाः सर्वे एव दुग्धतक्रदधिनवनीतादयो रसा गोरसशब्दवाच्याः** ( चसू. २७.२३६ ) न., **चतुर्थांशजलतक्रम्** ( धनि. ६.१८९ ) गाईचे दूध दही ताक लोणी इत्यादी. हे सर्व गोरस म्हटले जातात. दह्याच्या चवथा भाग पाणी घालून घुसळले की ताक.

**–रेखा**–स्त्री., **गोक्षुरः** ( र. १७.६७–६८ ) गोखरू. **गोरोचनं वा** ( र. १७.६७–६८ ) गोरोचन.

**–रोचन**–स्त्री., **गोपित्तम्** ( रा. १२.२३ असंउ. १ ) गाईचे पित्त.

**–लीढ**–पु., वनस्पति० **मुष्ककः** ( रा. ११.२२० ) मोखा.

**–लोमिका**–स्त्री., वनस्पति० **कटुस्तिक्ता हिमा ग्राहिणी दीपनी त्रिदोषघ्नी मूलरोगास्रदोषघ्नी च** ( रापरि. ५.३२ ) एक वनस्पती. कडू, तिखट, थंड, मळ बांधणारी, अग्निदीपक, त्रिदोषनाशक, मूळव्याध व रक्तदोषनाशक.

**–लोमी**–स्त्री., वनस्पति० **संज्ञास्थापनद्रव्याणामन्यतमा** ( चसू. ४.१८ ) शुद्धीवर आणावयाच्या द्रव्यापैकी एक. भूतकेशी, जटामांसी, वेखंड, अक्कलकाढा, पांढरी दूर्वा. **दूर्वा** ( ध. ४.१४४ ) दूर्वा. **वचा** ( ध. २.६ ) वेखंड. **काश्मीरस्थक्षुद्रकमानसरसि महौषधिर्गोलोमी जायते** ( सुचि. ३०.३२.३३ ) महौषधी. काश्मीरात लहान मानसरोवरात होते.

**–वन्दनी**– स्त्री., वनस्पति० **प्रियङ्गुः** ( ध. ३.१६ ) गव्हला.

**–वर**–न., **शुष्कच्छगणखण्डं गोर्वरम्** ( र. १०.५९ ) शेणी, गोवरी.

**–वरपुट**–न., **गोवरैस्तुषैर्वा दीयमानं पुटम्** ( र. १०,६० ) गाईच्या शेणीचे किंवा तुषांचे दिले जाणारे पुट.

**–विन्द**–ऋषि० **रससिद्धिप्रदायकेष्वेकः** ( र. १.२–५ ) पारदकर्मात सिद्धि मिळविलेला ऋषि.

**–वृषण**–पु., **वृषभाण्डम्** ( सुसू. १३.११ ) बैलाचे वृषण.

**–शीर्ष**–न., वनस्पति० **चन्दनम्** ( ध. ३.१ ) चंदन.

**–शृङ्ग**–न., वनस्पति० **बर्बुरः** (रापरि. ८.१२) बाभूळ.

**–ष्ठ**–पु., **गावस्तिष्ठन्ति विश्राम्यन्ति इति गवां विश्रामस्थानम्** ( चशा. ८.१९ ) गोठा, गाईंच्या विश्रांतीचे स्थान.

**–ष्ठी**–स्त्री., **लोकवार्ता** ( अहसू. ३.२५ ) लोकांच्या बातम्या, गप्पा. **सभा, सम्भाषणम्** ( सुचि., २४.१०१ ) सभा, संभाषण.

**–ष्फण**–पु., **बन्ध०** ( असंसू. ३८ ) गोफण, व्रणाचा बंध.

**–ष्फणाबन्ध**–पु., बन्ध०, **असंगते व्रणे चर्मणाऽसौ प्रयोज्यः** ( असंउ. ३१ ) गोफणबंध. खांद्यावर झालेल्या व्रणावर बांधावा.

**–संभवा**–स्त्री., वनस्पति० **गोलोमिका** ( रापरि. ५.३२ ) कोल्ह्याच्या शेपटासारखी वनस्पती.

**–सर्ग**–पु., **गवां किरणानां सर्गः प्रादुर्भावोऽत्र इति यद्वा गाः किरणान्सृजति आविर्भावयति इति गोसर्गः; प्रभातकालः** ( चइ. ८.२४; सुचि. २४;११७ ) प्रातःकाल, सकाळ.

**–सलिल**–न., **गोमूत्रम्** ( र. २०.२०४ ) गोमूत्र.

**–स्तनाकारमूषा**–स्त्री., मूषा० **शिखायुक्ताच्छादनसहिता गोस्तनाकारा मूषा** ( र. ९.५९–६० ) गाईच्या स्तनाच्या आकाराची मूस.

**–स्तनी**–स्त्री., वनस्पति० **द्राक्षा** ( ध. ५–५८ ) द्राक्ष.

**–स्तनीमूषा**–स्त्री., **गोस्तनाकारमूषा** ( र. १०.२६ ) गाईच्या स्तनासारखी मूस.

**गोजी**–स्त्री., वनस्पति० **गोजिह्वा** ( असंउ. ४४ ) गोजिव्हा, पाथरी.

दार्वीपत्रिका, शाखोटक इत्यन्या ( सुचि. १८.३२ ) एक वनस्पती.

**-पत्र**-न., वनस्पति० **गोजी, पत्रमस्यानुशस्त्रत्वेनोपयुज्यते** ( सुसू. ४.१५ ) ( सुचि. २२.१९ ) गोजिव्हा, पाथरी. हिचे पान शस्त्र म्हणून खरवडण्याकरिता उपयोगात आणता येते.

**गोटुभ**-पु., प्राणि० जलचरोऽयं (काखिल. २४.४१-४२) पाण्यातला एक प्राणी.

**गोणिक**-न., धान्यादिवहनाधारः ( असंसू. २६ ) धान्यादि साठवण्याची, वाहून नेण्याची आधारभूत पिशवी, थैली, गोणी.

**गोणी**-स्त्री., मान० **शूर्पद्वयम्** ( चक. १२.९६ ) माप, दोन सुपे.

**गोधा**-स्त्री., प्राणि० **बिलेशयोऽयं** ( चसू. २७.३८ ) **दंष्ट्रानखविषा** ( सुक. ३.५ ) **मांसगुणाः-मधुरं कषायं शीतं बलवर्धनं विषघ्नं बृंहणं वातपित्तशमनं श्वासरक्तविकारक्षयघ्नं च** ( धपरि. ६.३९) **विषघ्नं** ( असंसू. ७.९७ ) **हिक्काशमनार्थं मांसरस उपयुक्तः** ( सुउ. ५० २९ ) **मांसरसः कुष्ठहरे प्रलेपे उपयुक्तः** ( चचि ७.८८ ) **पित्तमृषभेऽगदे उपयुक्तम्** ( सुक. ५.६८ ) **नेत्ररोगेषु उपयुज्यते** ( असंउ. १६ ) **ग्रहचिकित्सायाम् उपयुज्यते** ( सुंउ. ६०.४० ) **एतत्पित्तसिद्धं तैलमपस्मारे पानाभ्यङ्गेषूपयुक्तम्** ( सुउ. ६१. २४-२५ ) **अस्याः दर्शनं रुतं चाप्रशस्तम्**, ( सुसू. २९. ३६-३७ ) **संयोगतः पयसा सह विषतुल्या भवति** ( सुसू. २०.८ ) **गोधामांसरसस्य नित्योपयोगेन शार्करेयश्मरी मेही च भवति** ( चशा. ८.२१ ) **गोधायाः पाटितं यकृदर्धं पिप्पलीभिः पूरितं शुचिमृत्तिकया लिप्तम् अग्निना च विपाचितं सद् दिनत्रयं यावद् भक्षितं चेदसंशयं नक्तान्ध्यं हन्ति । किञ्च तदन्तःस्विन्नाऽपि पिप्पली मधुना अञ्जनेन सह प्रयुक्ता नियतं नक्तान्ध्यनाशाय कल्पते** ( सुउ. १७.२४ )

घोरपड. बिळात राहणारा प्राणी. दात व नखे यात विष असलेला. **मांसाचे गुण**-गोड, तिखट, तुरट, थंड, वातपित्तनाशक, बलवर्धक, पौष्टिक, श्वास, रक्तविकार, क्षयघ्न, विषनाशक. **मांसरस**-उचकीवर पिण्यास, व कुष्ठावर लेपाकरिता उपयुक्त. **घोरपडीचे पित्त**-नेत्ररोग, ग्रहबाधा, ऋषभप्राण्याच्या विषावर उपयुक्त. या पित्ताने **सिद्ध तेल** अपस्मारावर गुणावह. हिच्या यकृतात पिंपळी घालून पुटपाकाने पचवली व ती तीन दिवस खाल्ली तसेच मधाबरोबर अंजन केले तर रातांधळे जाते. **हिचे मांस**-दुधाबरोबर खाणे विषाप्रमाणे. मांस नेहमी घेतल्याने मूतखडा व रेव होते.

**-पदी**-स्त्री., वनस्पति० **मुसलीकन्दः** मुसळीचा कांदा. ( रा. परि., ७.५८ )

**वनस्पति० हंसपदी** ( रा. ५.१६८ ) लाल रंगाची हंसासारख्या पायाच्या तीन बोटांसारखी पुढे पुढे वाढणारी वनस्पती.

**-वती**-स्त्री., वनस्पति० **वटपत्री** ( रा. ५.२११ ) एक पाषाणभेद.

**-स्कन्ध**-पु., वनस्पति० **इरिमेदः** ( ध. ५.१३३ ) शेण्या खैर.

**गोधिनी**-स्त्री., वनस्पति० **बृहती** ( रा. ४.१२३ ) रिंगणीचा प्रकार.

**गोधूम**-पु., धान्य० ( चसू. २७.२१ ) **गुणाः-मधुरः शीतः स्निग्धो गुरुर्वृष्यो जीवनः संधानकरो बृंहणो बल्यः सरः शुक्रवर्धनो वातपित्तघ्नः** ( ध. ६.५७ ) **सरक्ते वाते प्रदेहार्थमुपयुज्यते** ( चसू. ३.२३ ) **रुचिप्रदः श्लेष्मकरः** ( चसू. ४६.४३-४४ ) **वाजीकरणार्थमुपयुज्यते** ( असंउ. २५ ) **गोधूमश्चक्षुष्योऽपि तैलपक्वो दृष्टिनाशनः** ( असंसू. ७ ) **गोधूमपिष्टं सूक्ष्ममुखव्रणपीडनार्थमुपयुज्यते** ( सुसू. ३७.११ ) **गोधूमचूर्णमन्थोऽत्यग्निनाशनः** ( चचि. १५.२२६ )

हिं.—गेहूं.
म.—**गहू.**
गु.—घऊं.
त.—गोदुमु.

**गहू**—गोड, स्निग्ध, थंड, जड, वातपित्तनाशक, कफकर, जीवन चालवण्याला समर्थ, व्रण भरून आणणारा, पौष्टिक, बल, व शुक्रवर्धक; कामशक्तिवर्धक, सारक, रुचकर, सरक्त वातदुष्टीवर कणकेचा लेप; गहू हा डोळ्याला चांगला पण तेलात तळलेला दृष्टीला नाशक. कणीक पाण्यातून सूक्ष्मछिद्र असलेल्या व्रणावर तो वाढावा म्हणून लावावी. खाखा सुटते त्याला कच्ची कणीक पाण्यात कालवून द्यावी.

**-विकृति**-स्त्री., **गोधूमप्रकृतिको मोदकादिः** ( अहसू. ३.१२ ) गव्हाचे मोदक इ. पदार्थ, पक्वान्ने.

–संभवा–स्त्री., निर्यास० वंशरोचना ( ध. २.५६ ) वंशलोचन.

गोधूमक–पु., सर्प० राजिमानयम् ( सुक. ४.३४ ( ३ ) रेषा, पट्टे असलेला सर्प.

–( गोधूमी )–स्त्री., वनस्पति० गोलोमिका ( रापरि. ५.३२ ) पहा 'गोसंभवा.'

गोधेरक–पु., सविषकीट० तद्दष्टलक्षणम्–शोफो दाहो रुजा ग्रन्थिप्रादुर्भावो ज्वरश्च, एतेन दष्टो न जीवति ( सुक. ८.२८ )
एक विषारी किडा. चावला तर सूज, दाह, वेदना, गाठी, ताप येतो व हा मनुष्य वाचत नाही.

गोप–पु., रक्षकः, गोपः गोपालकः ( चसू. १.१२० ) गोपाळ, गुराखी.

–कन्यका–स्त्री., वनस्पति० सारिवा ( असंउ. ४५ ) अनंतमूळ.

–कन्या–स्त्री., वनस्पति० सारिवा ( ध. १.१६१ ) अनंतमूळ.

–कर्कटिका–स्त्री., वनस्पति० गोपालकर्कटिका ( रा. ३.२६४ ) अतिलहान काकडी.

–घोंट–पु., वनस्पति० विकङ्कतः ( ध. ५.४३ ) मऊ फळाची गांठाळ वनस्पती.

–( घोंटा )–स्त्री., वनस्पति० विकङ्कतः ( ध. ५.४३ )
मऊ फळाची गांठाळ वनस्पती.

–( घोण्टा )–स्त्री., वनस्पति० घोंटाबदरी ( सुचि. ११.१० ) एक बोर.
कर्कोटी ( सुसू. ३८.६–७ ड. ) कटोंले.
पूगभेदः ( सुसू. ३८.६–७ ड. ) सुपारीप्रकार.
बदरभेदः ( सुसू. ३८.६–७ ड ) बोराचा प्रकार.

–भद्रा–स्त्री., वनस्पति० काश्मरी ( रा. ९.१४७ ) शिवण.

–वल्ली–स्त्री., वनस्पति० सारिवा ( ध. १.१६१ ) अनंतमूळ.
मूर्वा ( रा. ३.११ ) मोरवेल.

–सुता–स्त्री., वनस्पति० सारिवा ( अहसू. १५.९ ) अनंतमूळ.

गोपक–न., निर्यास० बोलम् ( ध. ३.६२ ) बोळ.

गोपन–न., वनस्पति० तमालपत्रम् ( ध. २.५२ ) तमालपत्र.

गोपा–स्त्री., सारिवा० ( ध. १.१६१ ) अनंतमूळ.

–नसी–स्त्री., गृहाच्छादनाधारकाष्ठम् ( चसू. ३०.५ ) "आच्छादने स्याद्वलभी गृहाणां गोपानसी दारु च वक्रसंस्थम्" इति ( हलायुधे ३०३ ) गोपायति रक्षति गृहम् इति गोपानसी
सरा. वासा.

( गोपी )–स्त्री., वनस्पति० सारिवा ( असंसू. ८ ) अनंतमूळ.

–पुत्र–पु., प्रतुदपक्षि० ( चसू. २७.५० ) भक्ष्याला टोचून खाणारा एक पक्षी.

गोफणा–स्त्री., व्रणबन्ध० पाषाणगुडकोत्क्षेपकारिणीं गोफणां विदुः, तदाकृतिर्बन्धश्चिबुकनासौष्ठवस्तिषु विधेयः ( सुसू. १८.१७ )
गोफण. दगड लांब फेकण्याकरिता उपयोगात आणतात. गोफणेच्या आकाराचा बंध, पट्टा.

गोफणिका–स्त्री., बन्ध० कौपीनकम्, कच्छोटकम् ( सुचि. २.६७ )
गोफणेच्या आकाराचा बंध, पट्टा.
सीवनप्रकारेष्वेकः ( सुसू. २५.२२ )
शिवण्याचा प्रकार.

गोरट–पु., वनस्पति० खदिरः ( रा. ८.३८ ) खैर.

गोल–पु., वर्तुलाकारः पिण्डः ( रा. १८.११४–११५ ) वर्तुलाकार, पिंड.
वनस्पति० बोलः ( र. १५.६८ ) बोळ.
बालक्रीडनककाष्ठमयवर्तुलकन्दुकः ( काखिल. १२.६ )
मुलांचे खेळणे, लाकडाचा चेंडू.
मूषा ( र. २०.५०–५१ ) मूस.
काचकूपी ( र. ७.२० ) काचेची कुपी.

–फल–पु., वनस्पति० मदनः ( रा. ८.२३२ ) गेळफळ.

–मूषा–स्त्री., मूषा० पुटनीयद्रव्यगर्भा मुखरहिता सर्वत्र गोलकवदाकारा मूषा, एषा सत्वरद्रवरोधिनी ( र. १४.२९ )
मूस. भाजून काढावयाचे द्रव्य घालून सर्व बाजूंनी गोल आकाराची तोंडरहित मूस.

गोलक–पु., वनस्पति० मुष्ककः ( ध. ५.१३२ ) मोखा.
लोष्टः पिण्डिः ( र. २.४७–४८ ) ढेकुळ, गोळा.
उपधानविशेषो गोलाकारत्वाद् गोलकः ( चसू. १४.५३ )
गोल आकाराचा गोलक.

( गोला )–स्त्री., खनिज० मनःशिला ( ध. ३.९६ ) मनशीळ.

( गोलिका )–स्त्री., गुटिका ( र. १६.१५१–५३ ) गुटी, घुटी, गोटी.
वनस्पति० घोण्टा ( रापरि. ८.२२ ) एक बोर.

**गोह्ला**–स्त्री., वनस्पति० **बिम्बी** ( ध. १.२०२ ) तोंडली.

**गौड**–वि., **गुडोद्भवं, गुडविकारः** ( सुसू. ४५.२१२ )
गुळाचे पदार्थ.

**आसुत० गुडप्रकृतिक आसवः, अयं तर्पणो दीपनः सृष्टभिन्नशकृद्वातश्च** ( चसू. २७.१८६ )
गुळाचे आसव. हे तृप्तिकर, अग्निदीपक, मळाची गाठ फोडणारे, शौचास साफ करणारे, वातसारक.

**–पानक**–( परिव० ) न., **गुडकृतपानकम्** ( सुसू. ४६.३८८–८९ )
गुळाचे पन्हे–पेय.

**–सीधु**–पु., **आसुत० गुणाः–कषायमधुरः पाचनो दीपनश्च** ( सुसू. ४५.१८२ )
गुळाचे अरिष्ट. तुरट, गोड, पाचक, व अग्निदीपक.

**गौडारिष्ट**–पु., **आसुत० पाण्डुरोगे उपयुक्तम्** ( सुउ. ४४.३६ )
गुळाचे अरिष्ट. पांडुरोगात उपयुक्त.

**गौडिक**–वि., **गुडेन संस्कृतं संसृष्टं वेति गुडोद्भवमन्नम्** ( चसू. २३.४ ) गुळाचे केलेले अन्न.

**समितावेष्टिता गुडप्रधानोदरा गौडिका लड्डुका इत्युच्यन्ते। गुणाः—बृंहणो गुरुरनिलनाशनोऽदाही पित्तहरः शुक्रवर्धनः शुक्लश्च** ( सुसू. ४६.३९५ )
मध्ये गुळाचे पुरण असलेली व बाहेरून गव्हाची कणिक असलेली पुरी, सांजोरी, साटोरी, लाडू, करंजी इत्यादी. **गुण**–जड, वातनाशक, जळजळ न करणारी, पित्तनाशक, पौष्टिक.

**वनस्पति० मधूकः** ( ध. ५.४८) मोह.

**गुडकृतमद्यविशेषः** ( अहसू. १३.२ )
गुळाचे केलेले मद्य.

**–सीधु**–पु., **आसुत० गुडकृतं सस्यकम्** ( सुउ. ५५.२३ ) गुळाचे आसव.

**गौतम**–पु., **ऋषि० रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः** ( चसू. १.८; चचि. ११.४ )
चिकित्साविचारासाठी हिमालयाच्या उतरणीवर जमलेल्या ऋषींपैकी एक.

**गौधूमिका**–स्त्री., **गोधूमकृतभक्ष्यविशेषः** ( चसू. २७.२७१ )
गव्हाचा केलेला खाण्याचा पदार्थ.

**गौधेर**–पु., **सर्प० सविषोऽयं गोधेरः गोधेरकः** ( धपरि. ६.३९ )

**गोधिकात्मजः, स दर्वीकरविषसमः** ( असंउ. ४१ )
एक सर्प. नागाच्या विषासारखा मारक.

**गौधेरक**–पु., **सर्प० गोधायां सर्पाज्जातश्चतुष्पादः कृष्णसर्पेण तुल्यः** ( चचि. २३.१३४ )
घोरपडीला नागापासून झालेला नागासारखा विषारी.

**गौर**–न., **खनिज० हरितालम्** ( ध. ७.११९ ) हरताळ.

**पद्मकेसरम्** ( ध. ४.१६५ ) कमळकेशर.

**कुङ्कुमम्** ( रा. १२.२१ ) केशर.

**धवः** ( रापरि. ९.८ ) धावडा.

**पूतिकरञ्जः** ( ध. ५.१०७ ) घाणेरा करंज.

**कर्पूरः** ( रा. १२.५६ ) कापूर.

**इङ्गुदी** ( रापरि. ८.१७ ) हिंगणबेट.

**धान्य० शालिभेदः** ( चसू. २७.१३ )
साळीचा प्रकार.

**( गौरा )**–स्त्री., **वनस्पति० सुवर्णकदली** (रा. ११.११५)
सोनकेळ.

**( गौरी )**–स्त्री., **सिरा०** ( असंशा. ६ ) **श्वेतवर्णशिराभेदः, सा कफं वहति** ( सुशा. ७.१८ ) **'यदा तु कुपितः श्लेष्मा स्वाः शिराः प्रतिपद्यते। तदाऽस्य विविधा रोगा जायन्ते श्लेष्मसंभवाः॥'** ( सुशा. ७.१३ )
पांढऱ्या वर्णाच्या शिरांचा प्रकार. त्या कफ वाहतात. प्रकुपित कफ जेव्हा आपल्या शिरांमधून वाहतो तेव्हा विविध कफज विकार होतात.

**गोरोचना** ( ध. ३.२० ) गोरोचन.

**वनस्पति० हरिद्रा** ( असंउ. २२ ) हळद.

**आकाशमांसी** ( रा. १२.९५ ) जटामांसीप्रकार.

**प्रियङ्गुः** ( रा. १२.२८ ) गव्हला.

**धवः** ( धपरि. ५.४ ) धावडा.

**मल्लिका** ( रा. १०.२२५ ) मोगरा.

**मञ्जिष्ठा** ( रा.६.१५ ) मंजिष्ठ.

**दूर्वा** ( रा. ८.२२७ ) दूर्वा.

**तुलसी** ( ध. ४.५० ) तुळस.

**सुवर्णवर्णा ( भूमिः )**, ( सुसू. ३६.३ )
सोन्याच्या रंगाची जमीन. पिवळ्या मातीची जमीन.

**–चामर**–पु., **श्वेतकेशग्रथितं मशकनिवारणम्** ( सुउ. ७.२१–२२ )
चवरी. पांढऱ्या केसांची चवरी. माशा, डासांचे निवारणासाठी उपयोगी.

**–जीरक**–पु., **वनस्पति० जीरकभेदः शुक्लजीरकः** ( ध. २.६८ ) **द्र० 'जीरक'** पांढरे जिरे.

**–तित्तिरि**–पु., **तित्तिरिभेदः** ( सुसू. ४६.६३ )
तित्तिरीचा प्रकार.

**–दण्ड**–वि., वनस्पति० अपामार्गभेदः ( असंशा. १ ) द्र० ' अपामार्ग. '
आघाड्याचा प्रकार. पहा ' अपामार्ग. '

**–रम्भा**–स्त्री., वनस्पति० सुवर्णकदली ( रा. ११.११५ ) सोनकेळ.

**–वल्ली**–स्त्री., वनस्पति० प्रियङ्गुः ( रा. १२.२९ ) गव्हला.

**–शालि**–पु., वनस्पति० शालिः ( ध. ६.७० ) साळ, तांदूळ.

**–षष्टिक**–पु., वनस्पति० षष्टिकशालिधान्यभेदः ( अहृसू. ६.८ ) साठे तांदळाचा प्रकार.

**–सर्षप**–पु., सर्षपभेदः श्वेतसर्षपः ( चशा. ८.१९ ) पांढरी मोहरी.

**–सुवर्ण**–न., वनस्पति० शिशिरं पथ्यं कफपित्तज्वरदाहारुचिभ्रान्तिरक्तश्रमहरम् ( रापरि. ७.९१ )
शिंगाडा. प्रकार दोन. पाण्यातला व जमिनीवरचा. चित्रकूटाच्या भागात ( प्रयागाजवळ ) आहारात आहे. **गुण**–थंड, कफपित्तज्वर, दाह, भ्रांति, अरुचि, श्रम व रक्तस्रावहर.

**गौरव**–न., लक्षण० गुरुभावः ( चसू. १६.१३ )
**क्रियास्वसामर्थ्यम्** ( चचि. १६.४ )
**तत्सामान्यलक्षणम्–आर्द्रचर्मावनद्धं वा यो गात्रमभिमन्यते । तथा गुरु शिरोऽत्यर्थं गौरवं तद्विनिर्दिशेत् ॥** ( सुशा. ४.५५ )
जडपणा. कर्म करण्यास असमर्थ. ओले कातडे पांघरल्यासारखे वाटते व डोके अतिशय जड असते त्याला गौरव म्हणतात.

**गौराङ्गी**–स्त्री., वनस्पति० एला ( रा. ६.६८ )
वेलदोडा.

**गौरामलक**–पु., आर्द्रतया गौरवर्ण आमलकः ( चचि. २२.३६ )
ओलेपणामुळे पांढरा असा आवळा.

**गौराहिक**–पु., निर्विषसर्पः ( सुक. ४.३४. (४)
एक बिनविषारी साप.
**रसप्रदोषरोगेष्वेको रोगः** ( चसू. २८.९ )
रसदुष्टीमुळे होणारा रोग.

**गौरिजेय**–न., खनिज० अभ्रक ( रा.१३.२ ) अभ्रक.

**गौरी**–स्त्री., सिराविशेषः, इयं कफरक्तवाहिनी ( असंशा. ६ )
शिरांचा एक प्रकार.

**–ज** न., खनिज० अभ्रकम् ( रा. १३.२ ) अभ्रक.

**–तेजस्**–न., खनिज० अभ्रकम् ( र. २.३ ) अभ्रक.

**–पाषाण**–पु., खनिज० गौरीपाषाणः, सोमलः ( धपरि. ६.१४ ) अयं त्रिविधः–स्फटिकाभः, शंखाभो, हरिद्राभश्च, साधारणरसेष्वेकः ( र. ३.१३४.१३५ ) अस्य शोधनं–प्रथमं गौरीपाषाणं कारवल्लीफलमध्ये स्थापयेत् । अनन्तरं हण्डिकामध्ये दोलया स्वेदयेत् । दोलायन्त्रे कारवल्लीक्वाथं क्षिपेत् । प्रहरत्रयं स्वेदनं कुर्यात् । एवं स शुद्धो भवति । गुणाः–रसबन्धकरः स्निग्धः दोषनाशनः पारदवीर्यकरः ( ध. पा. २९१.३१५ )
सोमल. **प्रकार तीन.** (१) स्फटिकासारखा. (२) शंखासारखा व (३) हळदीसारखा. एक साधारण रसांपैकी एक. **शोधन**–कारलीच्या फळात घालून दोलायंत्रात कारलीचा काढा घालून त्यात तीन प्रहर उकळावे शुद्ध होतो. पारा बद्ध करणारा, स्निग्ध, दोषनाशक, पाऱ्याचे वीर्य वाढवणारा.

**–पुष्प**–पु., वनस्पति० करवीरः ( रा. १०.३ ) कण्हेर.

**–पुष्पभव**–न., खनिज० गन्धकः (र. ३.१७) गंधक.

**–ललित**–न., खनिज० हरितालम् ( रा. १३.५९ ) हरताळ.

**–सृष्टि**–पु., खनिज० गन्धकः ( र. १.६० ) गंधक.
**अभ्रकम्** ( र. १.६० ) अभ्रक.

**गौर्यादिघृत**–न., पित्तजविसर्पे समुपयुज्यमानो घृतविशेषः ( सुचि. १७.१०–१३ )
पित्तज विसर्पात हे तूप योजतात.

**गौल्या**–स्त्री., वनस्पति० चणिका ( रा. परि. ८.६५ )
एक वनस्पती, दूध वाढविणारी.

**ग्रथित**–वि., ग्रन्थियुक्तम् ( चसू. १३. ५७ ) घनीभूतम् ( चइ. ६.११ )
ग्रंथियुक्त, घन–घट्ट झालेले, गाठाळलेले.
न., रोग० अयं गुह्यरोगः; शूकैः आकीर्णमिव नाम आचितमिव लिङ्गं भवति । कफजो व्याधिरयम् ( असंउ. ३८.३२० )
शिश्नाचा रोग–कुसळांनी भरल्याप्रमाणे लिंग होते. कफजव्याधी.
**ग्रन्थिरिवोन्नतः** ( सुसू. १७.३ )
गाठीसारखा वर आलेला.

**ग्रथितान्त्रता**–स्त्री., लक्षण० पुरीषग्रन्थियुक्तमन्त्रम्, पुरीषस्रोतोविद्धस्य लक्षणम् ( सुशा. ९.१२ )
मळाच्या गाठी असलेले आंत्र. पुरीषवह स्रोतस कापले–ठेचले गेल्याचे लक्षण.

**ग्रन्थार्थ**–पु., शास्त्रार्थः ( सुउ. १९.१८ )
ग्रंथाचा अर्थ, शास्त्राचा अर्थ.

**ग्रन्थि**–पु., रोग० उत्सेधरूपः शोफः, तत्स्थानं रोहिणी नाम त्वक्, संप्राप्तिः–कफप्रधानाः मलाः मेदोमांसासृजि प्राप्य वृत्तोन्नतं श्वयथुं कुर्वन्ति। अयं वातपित्तकफास्रमांसमेदोऽस्थिशिराव्रणजभेदात् नवविधः (असंउ. ३४) लक्षणम्–वातजः–आयामतोदभेदान्वितोऽसितः स्थानात्स्थानान्तरगतिरकस्माद्वृद्धिहानिमान् मृदुर्बस्तिरिवानद्धो विभिन्नः सन् स्वच्छास्रस्रावी च, पित्तजः–सदाहो रक्तपीताभान्यतरो द्रुतपाकी भिन्नः सन् भिन्ने उष्णास्रस्रावी च; कफजः–नीरुजो घनः शीतः सवर्णः कण्डूमान्, स च पक्वो घनपूयस्रावी, रक्तजः–दोषैर्दुष्टे रक्ते जन्तुपूच्छ्रायमाप्नुवत्सु सिरामांसं संश्रित्य ग्रन्थिर्भवति। स सस्रापः पैत्तलक्षणः सदाहः पीताभो रक्तो वा द्रुतपाकी भिन्नश्च उष्णास्रस्रावी, मांसजः–मांसलाहारैर्दूषितेन मांसेन जायते स स्निग्धो महान् कठिनः सिरानद्धः कफाकृतिर्नीरुजो घनः शीतः सवर्णः कण्डूमान् पक्वश्च घनपूयास्रावी भवति; मेदोजः–मेदुराहारैः प्रवृद्धं मेदस्त्वचि मांसे वा वायुना नीतं ग्रन्थिरूपं जायते स भृशस्निग्धो मृदुश्चलः श्लेष्मतुल्याकृतिर्देहक्षयवृद्धिक्षयोदयश्च; भिन्नोऽयं घनताम्रसितासितमेदःस्रावी च, अस्थिभङ्गाभिघाताभ्यामुन्नतावनतं यदस्थि तन्निमित्तो ग्रन्थिः, सिराजः–पदातेः सहसा जलावगाहनाद् व्यायामाद्वा प्रतान्तस्य क्रुद्धो वायुः सशोणितं सिराजालं संपीड्य संकोच्य वक्रीकृत्य विशोष्य च ग्रन्थिं कुरुते। स निःस्फुरो नीरुजश्च भवति; व्रणजः–अरूढे रूढमात्रे वा व्रणेऽपथ्यसेविनो नवे बन्धरहिते वा व्रणे, गात्रेऽश्माभिहते वा कुपितो वातोऽसृतं दुष्टमस्रं संशोष्य व्रणं ग्रथितं कुर्यात्। स सदाहः कण्डूमाँश्च भवति; (असंउ. ३४) एतेषु दोषास्रमेदोजाः पञ्च साध्याः स्थूलखराश्चलाः मर्मकण्ठोदरस्थाश्च असाध्याः (असंउ. ३४) चिकित्सासूत्रम्–छेदनं भेदनं जलौकावचरणमग्निपरिवेषणं च

(सुसू. १२.१०; चसि. १८.८–११;
(सुसू. २५.५)

वर उचललेली सूज. **स्थान**–रोहिणी त्वचा. **संप्राप्ति**–कफप्रधान दोष मेद, मांस व रक्त यांची दुष्टि करून वाटोळी व उचलून वर आलेली सूज करतात. **प्रकार**–वात, पित्त, कफ, रक्त, मांस, मेद, अस्थि, शिरा व व्रणज असे ९ यातील दोषज ३ रक्त व मेदोज असे ५ प्रकार साध्य. मोठ्या, खरखरीत, हालणाऱ्या, मर्मस्थान, गळा व पोट यांतल्या असाध्य. **उपचार**–जळवा लावणे, कापणे, फोडणे व डाग देणे. त्या सर्वांची क्रमशः **लक्षणे**– १ **वातज**–सूज पसरत जाणे, टोचणी, फुटल्यासारखी पीडा, वर्ण काळा, एका ठिकाणाहून दुसरीकडे जाणारी, अकस्मात् वाढणे, कमी होणे, मऊ, बस्तीप्रमाणे फुगलेली व फुटल्यास स्वच्छ रक्ताचा स्राव होणारी अशी ही गाठ असते. २ **पित्तज**–दाहयुक्त, लाल, पिवळा कोणतातरी रंग, लौकर पिकणे, फुटल्यावर अति उष्ण स्राव स्रवणे. ३ **कफज**–पीडा नसणे, घट्टपणा, थंडपणा, रंग त्वचेसारखाच. खाज असणे, पिकून फुटल्यास घट्ट पू निघतो. ४ **रक्तज**–दुष्टदोष रक्ताला दूषित करतात. व शिरास्नायूंचा आश्रय करून ग्रंथि निर्माण करतात. त्यावेळी त्याठिकाणी बधिरता, व पित्ताची दाह, लौकर पिकणे, फुटणे इ० लक्षणे होतात. स्रवणारे रक्त उष्ण असते. ५ **मांसज**–मांसाहार अति करणाऱ्यांचा मांसधातु दुष्ट होऊन ग्रंथी होतो. तो स्निग्ध, मोठा, कठिण, शिरांनी व्याप्त, कफाची सर्व लक्षणे असलेला, थंड, त्वचेच्याच वर्णाचा, कंडूयुक्त असतो, व फुटल्यास घट्ट पू स्रवतो. ६ मेदोज–मेद वाढवणारा आहार शरिरात मेद वाढवतो व त्वचेत किंवा मांसात वायूच्या प्रेरणेने पोचून ग्रंथीचे रूप धारण करतो. तो ग्रंथि अत्यंत स्निग्ध, मऊ, हलणारा, कफाची लक्षणे असणारा व शरिरात मेदाची वाढ झाली तर वाढणारा व मेद क्षीण झाल्यास कमी होणारा असतो. फुटल्यावर घट्ट, तांबडा, पांढरा, काळसर असा मेदस्राव त्यातून होतो. ७ **अस्थिज**–हाड मोडणे, अथवा त्यावर आघात झाल्यामुळे उंच नीच झालेले हाड ग्रंथी निर्माण करतो. ८ **सिराज**–पायी प्रवास करून येताच एकदम थंड पाण्यात पोहणे वा आंगावर घेणे, किंवा श्रम करणे ही नित्य सवय असणाराचा कुपित वायु रक्ताशी युक्त होऊन शिरांचे जाळे छिन्न विच्छिन्न, संकुचित, वेडेवाकडे, आणि शुष्क करून ग्रंथि निर्माण करतो; त्यात स्फुरण अथवा पीडा नसते. ९ **व्रणज**–व्रण भरून आला असता वा नसताना जे लोक कुपथ्य करतात किंवा व्रण नव्यानेच झाला असून तो नीट बांधला गेला नाही, अवयवावर दगड इ० कठीण पदार्थांचा

आघात झाला तर वात कुपित होऊन स्रवणारे रक्त शुष्क करतो व व्रणाला गाठीसारखा बनवतो. असा तो ग्रंथि दाह आणि कंडूयुक्त असतो.
**ग्रथनं यथा व्रणबन्धस्य ग्रन्थिः** ( असंसू. ३८ )
व्रण बांधण्याच्या पट्टयाची गाठ.

**–क्षतक्रिमि**–पु., **ग्रन्थ्युपलक्षितं यत्क्षतं तत्र ये क्रमयस्ते** ( सुसू. २३.८ )
गाठीच्या स्वरूपाच्या जखमेत झालेले क्रिमि.

**–दल**–पु., **वनस्पति० चोरकः** ( रा. १२.१२८ )
चोरओवा.

**( –दला )**–स्त्री., **वनस्पति० मालाकन्दः** ( रापरि. ७.४४ )
मालाकंद, गंठोणी.

**–दूर्वा**–स्त्री., **वनस्पति० दूर्वा** ( रा. ८.२३२ )
दूर्वाप्रकार.

**–निकुञ्चन**–न., **ग्रन्थिसंकोचः ग्रथितत्वम्** ( चचि. २३.१७७ )
गाठ आखडणे, तिचा संकोच होणे. सुरकुतणे.

**–पत्र**–पु., **वनस्पति० चोरकः** ( रा. १२.१२८ )
चोरओवा.

**–पर्ण**–न., **वनस्पति० चोरकः** ( रा. १२.१२८ )
चोरओवा, गंठोना.

**( –पर्णी )**–स्त्री., **वनस्पति० जन्तुका** ( रा. ३.१२९ )
लाखेची वेल-माळव्यात जन्तुका नावाने प्रसिद्ध लाख.
**दूर्वा** ( रा. ८.२३४ ) दूर्वा.

**–फल**–न., **वनस्पति० मदनः** ( रा. ८.२३२ )
गेळफळ.
**कपित्थः** ( रा.११.१५५ ) कवठ.
**साकुरुण्डः** ( रापरि. ६.१६ )
वस्त्र रंगवण्यास उपयुक्त वनस्पती. कफवातनाशक.

**–मूढता**–स्त्री., **ग्रन्थेरदर्शनम्** ( सुसू. ३३.२१ )
गाठ न दिसणे.

**–मूल**–न., **वनस्पति० गृञ्जनम्** ( रा. ७.५५ )
गाजर, लाल कांदा.

**( –मूला )**–स्त्री., **वनस्पति० दूर्वा** (रा. ८.२३२) दूर्वा.

**–रेतस्**–न., **शुक्रदुष्टिः** ( असंशा. १ )
शुक्राच्या दुष्टीचा एक प्रकार. गाठाळ शुक्र, गाठी असलेले.

**–वात**–पु., **ग्रन्थिजन्यो वातरोगः** ( र. १५.५६–५७ )
गाठीमुळे झालेला वातरोग.

**–विसर्प**–पु., **रोग०, स्वरूपम्–स्थिरगुरुकठिनमधुरशीतस्निग्धान्नपानाभिष्यन्दिसेविनामव्यायामादिसेविनामप्रतिशीलानां श्लेष्मा वायुश्च प्रकोपमापद्यते, तावुभौ दुष्टप्रवृद्धावतिबलौ प्रदूष्य दूष्यान् विसर्पाय कल्पेते; तत्र वायुः श्लेष्मणा विबद्धमार्गस्तमेव श्लेष्माणमनेकधाभिन्दन् क्रमेण ग्रन्थिमालां कृच्छ्रपाकसाध्यां कफाशये संजनयति, उत्सन्नरक्तस्य वा प्रदूष्य रक्तं सिरास्नायुमांसत्वगाश्रितं ग्रन्थीनां मालां कुरुते तीव्ररुजानां स्थूलानामणूनां वा दीर्घवृत्तानां रक्तानां तदुपतापाज्ज्वरातीसारकासहिक्काश्वासशोषप्रमोहवैवर्ण्यारोचकाविपाकप्रसेकच्छर्दिमूर्च्छाङ्गभङ्गनिद्रारतिसदनाद्याः प्रादुर्भवन्त्युपद्रवाः। स एतैरुपद्रुतः सर्वकर्मणामतिपतितो विवर्जनीयो भवति** ( चचि. २१.३६ )
जो रोग त्वचेवर एके ठिकाणी न रहाता सारखा पसरत जातो तो पसरणारा. म्हणजे विसर्प.. धावरे.
**कारण**–स्थिर, जड, कठीण, गोड, थंड, स्निग्ध, स्राव निर्माण करणारा, आहार घेणारा व व्यायाम, रेचक, वामक इ० शरीर शुद्ध करणाऱ्यांचे सेवन न करणाऱ्याचा कफ व वायु खूप वाढतात, हे अतिबलवान दोष रक्तादि धातु दुष्ट करून विसर्प करतात. यांत पसरणाऱ्या ग्रंथी निर्माण होतात त्याला ग्रंथिविसर्प म्हणतात. रक्त अधिक दुष्ट असल्यास शिरा स्नायु मांस त्वचा यात व कफ अधिक दुष्ट असला तर कफस्थानात हा होतो. यात तीव्रवेदना व रक्त तप्त झाले तर ज्वर अतिसारादि उपद्रव होतात. यानी पीडित व शोधनादि चिकित्सा करण्यास अयोग्य असा रोगी असाध्य समजावा.

**ग्रन्थ्यपच्यर्बुदगलगण्डचिकित्सित**–न., **अध्याय०** ( सुचि. १८.१ )
अध्यायाचे नाव–ग्रंथि इ०ची चिकित्सा सांगितलेला.

**ग्रन्थ्यपच्यर्बुदगलगण्डनिदान**–न., **अध्याय०** ( सुचि. ११.१ )
अध्यायाचे नांव, ग्रंथि इ०ची माहिती असलेला.

**ग्रन्थिक**–पु., **कर्णवेधापयोगेन जायमानोपद्रवः** ( सुसू. १६.७ )
कान टोचण्यात चूक झाली असता झालेला उपद्रव.
**वनस्पति० विकण्टकः** ( रापरि. ११.१९ )
पावसाळ्याची मेघगर्जना होते तेव्हा फळे येणारा. मऊ फळाची, गाठाळ, रंगाच्या उपयोगी वनस्पती.

**वनस्पति०**–न., **पिप्पलीमूलम्** ( ध. २.७५ ) ( सुचि., ३७.३७ ) पिंपळमूळ.

**ग्रन्थिन्**–पु., **वनस्पति० हिमावली** ( रापरि. ६.१८ ) हिमावली नावाने ओळखली जाते. रक्तदोषनाशक. कडु, सारक, वसु.

**ग्रन्थिनिका**–स्त्री., **वनस्पति० महामुण्डी** ( ५.२२० ) महामुंडी.

**ग्रन्थिल**–न., **वनस्पति० पिप्पलीमूलम्** ( रा. ६.११३ ) पिंपळमूळ.

**विकङ्कतः** ( ध. ५.४३ ) मऊ व पुष्कळ फळे येणारी व दातवणालाही उपयुक्त वनस्पती.

**तण्डुलीयकः** ( रा. ५.२० ) तांदुळजा.

**करीरः** ( ध. ५.९९ ) नेवती.

**चोरकः** ( रा. १२.१२८ ) चोरओवा.

**हिमावली** ( रापरि. ६.१८ ) पहा 'ग्रन्थिन्'.

**कन्दग्रन्थिः** ( रापरि. ७.२४ ) मोठाले लवयुक्त अनेक कंद एकत्र असलेली विड्याच्या पानासारखी पाने असलेली वनस्पती.

**( ग्रन्थिला )**–स्त्री., **वनस्पति० मुस्ता** ( रा. ६.५९ ) नागरमोथा.

**मालादूर्वा** ( रा. ८.२३२ ) दूर्वाप्रकार.

**दूर्वाभेदः, गण्डदूर्वा** ( रा. ८.२३४; ) द्र० दूर्वा, दूर्वाप्रकार. पहा 'दूर्वा'.

**ग्रन्थी**–स्त्री., **वनस्पति० पिप्पलीमूलम्** ( र. १९.४५–४८ ) पिंपळमूळ.

**ग्रस्त**–वि., **सर्वात्मना मीलितः** ( र. १५.४४–४६ ) पूर्ण मिसळलेला, व्यापलेला.

**सर्वथानुच्चारः ( चक्रः )** ( चइ. १.१४ ) मुळीच उच्चारता येत नाही असा शब्द. मुळीच उच्चार करता न येणे, घशातून बाहेर न येणारा आवाज ( स्वर ).

**–यन्त्र**–न., **पारदबन्धनार्थं निर्मिता स्थूलमूषोदराविष्टाऽऽद्यन्तसमानवर्तुला तले च चिपिटा मूषा** ( र. ९.६७ ) पारा घट्ट व्हावा म्हणून त्याकरिता केलेले यंत्र. एका मोठ्या मुसेत बसणारी त्याच आकाराची पण तळाला चपटी असणारी मूस.

**ग्रह**–पु., **सूर्याचन्द्रमसोर्ग्रहणम्** ( चइ. ४.१४ )
**" भत्रिपादान्तरे राहोः केतोर्वा संस्थितो रविः ।
चतुष्पादान्तरे चन्द्रस्तदा सम्भाव्यते ग्रहः ॥"**
**( तिथितत्त्वे )** चंद्रसूर्यांचे ग्रहण.

**राहुः** ( चशा. ५.१४ ) राहु.

**विज्ञानम्, उपलब्धिः** ( चनि. १.४२ ) विज्ञान.

**निग्रहः, सङ्गः, अवरोधः** ( र. ५.२३९ ) पकडणे, सांठणे, अडवणे.

**लिङ्गम्, ज्ञापकं चिह्नं वा गृह्यते ज्ञायतेऽनेनेति ग्रहः** ( चइं. ५.१२ ) चिन्ह. ज्याने ज्ञान होते ते.

**सूर्यादिदेवता० ज्योतिश्शास्त्रादेवास्य ज्ञानम्** ( सुसू. ३२.४ )
**" सूर्यश्चन्द्रो मङ्गलश्च बुधश्चापि बृहस्पतिः ।
शुक्रः शनैश्चरो राहुः केतुश्चेति नव ग्रहाः ॥"**
सूर्य चंद्र इत्यादी नवग्रह.

**सोमपानपात्रम्, गृह्यते उपादीयतेऽनेनेति ग्रहः पात्रम् इति व्युत्पत्तिलभ्योऽयमर्थः** ( चचि. १ ( ४ ) ४६ **चक्रः** ) सोम पिण्याचे पात्र.

**ग्रहचिकित्सा, ग्रहार्तत्वम्** ( हे ), **अष्टाङ्गायुर्वेदे एकमङ्गम्** ( अहसू. १.५ ) ग्रहांचे निदान व चिकित्सा. आयुर्वेदाच्या आठ अंगांपैकी एक.

**देवादिः, तस्यावेशलक्षणम्, तत्र गुप्तविज्ञानमनागतविज्ञानममानुषी क्रिया क्रोधनत्वमनवस्थितिश्च मनःशरीरयोर्भवति** ( सुउ. ६०.४ ) **तत्रासाध्यलक्षणम्–यः ग्रहाविष्टो विस्फारितनेत्रस्त्वरितगतिः स्वफेनलेही निद्रालुरतिकम्पमानः स्थले स्थले पतनशीलः पर्वतगजवृक्षाश्वभ्रनदीतटाकादिविच्युतः सन् ग्रहाविष्टो वार्धकेन भावेन जुष्ट एतादृशलक्षणवान् साध्यो न भवति** ( सुउ. ६०.१६ ) **तत्र नस्याभ्यञ्जनसेकादिश्चिकित्सा** ( सुउ. ६०.४० ) **दैवव्यपाश्रयचिकित्सायां च जपाः सनियमा होमा रक्तानि गन्धमाल्यानि कुङ्कुमरक्तकरवीरादीनि बीजानि सर्षपयवप्रभृतीनि लड्डुकफेनकगुडादयो भक्ष्याः** ( सुउ. ६०.२८.२९ ) **देवाद्यनुचरेभ्यस्तत् ग्रहणनियतदिनेष्वेव यथेष्टानि मांसानि रुधिराणि वा देयानि । इष्टत्वं च वस्त्रादिवस्तूनां विविधानां 'सन्तुष्टः शुचिरपि चेष्टगन्धमाल्यः' इत्यादिग्रहलक्षणतो ज्ञातव्यम्** ( ६०.३०,३१ ) देव इत्यादींनी पछाडले तर. **लक्षणे**–गुप्त असलेल्या गोष्टींचे ज्ञान, भविष्याचे ज्ञान, मनुष्याच्या पेक्षा जास्त सामर्थ्याची कृत्ये करणे, राग येणे अशी लक्षणे होतात.

व चित्ताचे चंचलत्व होते. **असाध्यलक्षण**—ज्याचे डोळे वटारलेले, जो शीघ्र गतीचा आहे, तोंडातून बाहेर पडणारी लाळ कफ जो पुन्हां चाटतो, झोपाळू, बेचैन, थरथर कांपणारा, जागोजाग पडणारा स्वप्नात पर्वत, हत्ती, झाड, उंच ठिकाण, नदीचा तट इत्यादिकांवरून खाली पडणारा, वृद्ध, ग्रहाने धरलेला असाध्य. **उपचार**—नाकात व डोळ्यात नस्य व अंजन करणे, अभ्यंग, अंगावर पाणी, औषधे शिंपडणे, दैवी उपाय, जप, होम, तांबडी फुले, गंध, रक्त, मांस, मोहरी, जव व वस्त्रे इत्यादी अर्पण करावी.

**भूतपिशाचादिग्रहलक्षणम्** ( चचि. ९.२१ ) **सज्जुष्टलक्षणम्**—प्रततं रोदनं ज्वरः ( असंउ. ३ ) ऊर्ध्वनिरीक्षणम् ( सुशा. १०.५१ )

**असाध्यलक्षणम्**—अतिस्तब्धाङ्गत्वं स्तनद्विट्त्वं ग्रहाविष्टवच्चेष्टितं च ( सुउ. २७.१७ ) **चिकित्सा**—आथर्वणोक्ता ग्रहचिकित्सा ग्रहशान्त्यादिका, उन्मादेऽपि ग्रहोद्दिष्टा चिकित्सा ( सुउ. ६२.३३ ) **ग्रहोपसर्गहेतुः**—'त्रासयेन्नाविधेयं च त्रस्तं गृह्णन्ति हि ग्रहाः। वस्त्रपातात् खरस्पर्शात् पालयेल्लङ्घनाच्च तम्' ( असंउ. १ ) **ग्रहनामानि**—स्कन्दग्रहस्कन्दापस्मारशकुनिरेवतीपूतनाऽन्धपूतनाशीतपूतनामुखमण्डिकानैगमेषा इति ( सुउ. २७.४–५ ) **ग्रहग्रहणकालः**—देवग्रहाः पौर्णमास्यां, दैत्यासुराः सन्ध्ययोर्गन्धर्वा अष्टम्यां, यक्षाः प्रतिपदि, पितरः कृष्णपक्षे, उरगाः पञ्चम्यां, रक्षांसि निशि, पैशाचाश्चतुर्दश्याम् ( सुउ. ६०.१७ ) तीव्रतपांसि दानं व्रतानि धर्मो नियमः सत्यं गुणाश्चाणिमादिसिद्धिरूपाः। एते सप्त गुणा देवादिग्रहेषु नित्याः सन्ति। देवादिपिशाचान्तेषु समस्तव्यस्तरूपेण। देवग्रहाणां समस्ता असुरादिग्रहाणां व्यस्ताः यथाप्रभवं ज्ञेयाः (सुउ. ६०.२०) **ग्रहाणां बलिद्रव्याणि बलिस्थानानि च**—देवग्रहाणां छत्रकुशस्वस्तिकाऽपूपाज्यघृतपायसादिर्बलिहोममादौ कृत्वा देवग्रहासुराणां चत्वरादौ, गन्धर्वाणां मद्यमांसाकुलो जाङ्गलो गोष्ठे, यक्षाणां हृद्ये वेश्मनि कुल्माषासृक्सुरा अतिमुक्तककुन्दाब्जैः सह, पितॄणां कुशास्तरणं कृत्वा नदीकूले तिलगुडपायसादिः, नागानां तत्रैव गुडमध्वासवपायसादिः, रक्षसां चतुष्पथादौ भयङ्करे वने वा मांसासृक्सुरादिः, पिशाचानां शून्यागारेऽपक्वपशूपहारो मद्योत्कटो बलिश्च देयः ( सुउ. ६०.३२–३७ )

**भूतपिशाच्च इत्यादी ग्रहांची लक्षणे.** बालक सारखे रडते, वर पहाते, ताप असतो. **असाध्य लक्षण**—अंग अगदी जखडते, ताठ होते, स्तनपानाचा तिटकारा करते व इतर ग्रहाने पछाडल्याप्रमाणे हालचाल. **उपचार**—आथर्वणवेदोक्त ग्रहशांति इ०, उन्मादातही हेच. **कारणे**—मुलाला भिवविणे, त्रास देणे, कपड्याने वारा घालणे, खरखरीत वस्त्र इ० चा स्पर्श आणि लङ्घन ही संभवतात. **ग्रह पछाडण्याचा काल**—यक्ष प्रतिपदेला, उरग पंचमीला, गंधर्व अष्टमीला, पिशाच्च चतुर्दशीला, देवग्रह पौर्णिमेला, उरग कृष्णपक्षात दैत्य, असुर, संध्याकाळी व राक्षस रात्री. बळी द्यावयाची द्रव्ये, स्थाने व ग्रहांची नावे वर आहेत.

**–कारिका**–स्त्री., ग्रहमातृ० ( असंउ. ४ ) ग्रहमाता.

**–घ्न**–पु., वनस्पति० सर्षपः ( ध. ४.४२ ) मोहरी.

**–घ्नधूप**–पु., बालग्रहघ्न–धूपकल्पविशेषः ( का धूपकल्पाध्याय १ )

बालग्रहाचा नाशक धूप.

**( –घ्नी )**–स्त्री., वनस्पति० श्वेतसर्षपः ( काचिउदावर्त अ. ) पांढरी मोहरी.

**–चार**–पु., रविसोममंगलादिग्रहाणामन्यराशिप्रवेशः ( असंशा. १२.३ )

सूर्य चंद्र मंगळ इत्यादी ग्रहांचा दुसऱ्या राशीत प्रवेश.

**–च्छाया**–शनैश्चरादीनां पिशाचादीनां वा बाधा ( सुशा. १०.४६ )

शनिग्रह इत्यादी किंवा पिशाच्च इत्यादींची बाधा.

**–नाशिनी गुटिका**–स्त्री., भैषज्य० पाननस्याञ्जनलेपस्नानोद्वर्तनधूपनार्थमुपयुज्यते ( र. २२.१६२.१६३ )

ग्रहनाशक गुटिका. ही पिणे, नाकात घालणे, लेप, स्नान, उटणे, धूप यांकरिता योजितात.

**–मातृ**–स्त्री.. ग्रहरोगकारकेष्वेका; मातृग्रहसंख्या नामानि च—औला, नीला, खला, काला, नकुला, गृहकारिका, सेना, सुसेना, माता, महासेना, यशस्विनी, कृतमालाऽक्षतशिरा इति त्रयोदश ग्रहमातरः ( असंउ. ४ )

ग्रहबाधा करणाऱ्यांपैकी एक. यांची तेरा नावे वर आहेत.

**ग्रहण**–न., ग्रन्थादिधारणम् ( चवि. ४.८ )

ग्रंथातील ज्ञान बुद्धीत धारण करणे.

**धारणं, संधारणं, यच्च बडिशयन्त्रस्य कार्यम्** ( असंसू. ३४. )

बडिशयंत्राचे जे धारणकार्य ते.

आत्मा, गृह्णाति भूतानि पाञ्चभौतिकशरीरप्रवेशापदेशेन इति ग्रहणम्, आत्मा ( चशा. ४.८ )
आत्मा. शरिरात प्रवेश करण्याच्या निमित्ताने पाच भूतांचे ग्रहण करतो.

**( ग्रहणी )**–स्त्री., शारीर० अग्न्यधिष्ठानम् ( चचि. १५.५६ ) नाभेरुपरि ग्रहणादन्नस्य ग्रहणीति संज्ञा; अग्निबलेनोपस्तम्भितोपबृंहिता चापक्वमन्नं धारयति वामपार्श्वतः पक्वं सृजति । अग्निबले ( दुर्बले ) मन्दे क्षीयमाणे वा साऽपक्वमेवान्नं सृजति ( चचि. १५.५६–५७ चक्र. ) ग्रहणी स्थूलान्त्रस्य वामभागेऽपि स्थिता । 'वामाश्रयोऽग्निर्ग्रहणी गुदं च' ( चसि. ३.२४ )

तत्र वातवर्चोनिरसनं स्थूलान्त्रप्रतिबद्धं गुदं नाम मर्म ( सुशा. ६.२४ ) वातः श्रोणिगुदसंश्रयः, तदुपरि अधो नाभेः पक्वाशयः ( सुसू. २१.६ ) पित्ताशयस्योपरिष्टात् आमाशयः ( सुसू. २१.१२ ) पक्वामाशयमध्यं पित्तस्य ( सुसू. २१.६ )
कोष्ठस्था अग्न्यधिष्ठानभूता नाडी ( चसू. १३.६८ चक्र. ) पित्तधरा नाम या षष्ठी कला सा पक्वामाशयमध्यस्था ग्रहणीति प्रकीर्तिता ( सुउ. ४०.१६८ ) पक्वाशयद्वारि भुक्तमार्गार्गलेव सा स्थिता ( अहृशा. ३.५० )

शारीर अवयव. पाचक अग्नीचे स्थान. मोठ्या आतड्याशी संबद्ध असा गुद हा शेवटचा अवयव आहे. गुदाच्यावर पण कटिप्रदेशाच्या आतला मोठ्या आतड्याचा जो उतरता भाग तो वाताचे स्थान आहे. म्हणून याला वाताशय म्हणतात. कटि, श्रोणी ही याचीच नावे होत. कटीच्या वरचा व नाभिरेषेच्या खालचा जो मोठ्या आतड्याचा भाग त्याला पक्वाशय म्हणतात. खाल्लेले अन्न प्रथम जेथे येऊन साठते तो आमाशय होय. तो आणि पक्वाशय या मधील भागाला पित्ताशय नाव असून यातच पित्तधरा कला असते. ग्रहणी हे याचेच नाव आहे. सर्व लहान आतडे व मोठ्या आतड्याचा पक्वाशयापर्यंतचा चढता, आडवा आणि उतरता भाग मिळून ग्रहणी हा अवयव बनतो. लहान व मोठ्या आतड्याच्या संधिस्थानी असलेल्या पुच्छसदृश व ज्याला आंत्रपुच्छ म्हटले जाते त्या क्षुद्रांत्राचाही यातच समावेश होतो. अशी ही ग्रहणी संपूर्ण अन्नमार्गातील अर्गला म्हणजे अडसरच होय. कारण खाल्लेल्या अन्नावर पचनाचे संस्कार घडवणे व ते घडेतो त्या अन्नाला अडवून धरणे हे कार्य अर्गला किंवा अडसररूपी ग्रहणीच करते.

तथापि अग्नीच जर दुर्बल असेल तर पचनाच्या क्रमशः होत जाणाऱ्या प्रक्रिया नीट होणार नाहीत व मग असेल तसेच अपक्व वा अर्धपक्व अन्नच पुढे पक्वाशयाकडे जाणे अपरिहार्य ठरते. कारण अग्निबलावरच ग्रहणीचे व ग्रहणीच्या सामर्थ्यावरच अग्नीचे बल ही परस्पर अवलंबून असतात.

सहावी पित्तधराकला म्हणून शास्त्रात वर्णिलेली जी ग्रहणी ती हीच होय. अपक्व अन्नाला अडकवून ठेवून पक्व झाल्यानंतरच दुसऱ्या द्वाराने त्याचे विसर्जन करणे हे महत्त्वाचे कार्य हा शारीर अवयव करीत असतो.

स्त्री., रोग० अग्न्यधिष्ठानभूतायाः ग्रहण्या बलमग्निः सोऽप्यग्निर्ग्रहणीमाश्रितस्तस्मादग्नौ प्रदुष्टे ग्रहणी संदूषिता भवति । ततो व्याधिरूपत्वमापद्यते । सा दुष्टा सती दुष्टमदुष्टमन्नं पक्वमपक्वं वा बहून्वारान् मुञ्चति । विसृष्टं तद्दुर्गन्धि कदाचिद्बद्धं कदाचिद्द्रवं वेदनायुक्तं च भवति ( सुउ. ४०.१६५ ) संप्राप्तिः–सा चतुर्विधा पृथग्दोषजा सर्वदोषजा च; निवृत्तेऽप्यतीसारे मन्दाग्नेरपथ्यसेविनो ग्रहणीव्याध्युत्पत्तिसंभवः, अनुत्पन्नातीसारस्यापि ग्रहणीव्याध्युद्भवः; अग्निनिर्वापणकारणैर्ग्रहणीदोषात्तद्व्याधिसंभवः ( सुउ. ४०.१६५ ) पूर्वरूपाणि–अन्नविदाहोऽङ्गसाद आलस्यं पिपासा क्लमः कर्णक्ष्वेड अन्त्रकूजनं बलक्षयोऽरुचिः कासश्च ( सुउ. ४०.१७२ ) चिरात्पचनमम्लकः प्रसेक आस्यवैरस्यं भ्रम आनद्धोदरता ( असंनि. ८ ) गौरवम् ( चचि. १५.५५ ) सामान्यलक्षणम्, शूनपादकरत्वं कृशत्वं संधिपीडा सर्वरसलोलुप्यं पिपासा छर्दिर्ज्वरोऽरुचिबाहुल्यं दाहो लालास्रावस्तमक आस्यवैरस्यं शुक्तोद्गिरणं तिक्ताम्लाद्युद्गिरणं लोहगन्धिधूमगन्ध्यामगन्ध्युद्गिरणं च ( सुउ. ४०.१७३–१७४ ) धूमको मूर्च्छा शिरोरुग्विष्टम्भश्च ( असंनि. ८ ) वातजग्रहणीलक्षणम्–पायुहृदयपार्श्वद्वयोदरमस्तकेषु शूलः कृष्णारुणवर्णैर्नखविण्मूत्रनयनाननैर्हृत्पाण्डूदरादिरोगाशङ्का चास्य भवति ( सुउ. ४०.१७५ ) तालुशोषस्तिमिरः कर्णस्वनः पार्श्वोरुवङ्क्षणग्रीवारुजाऽभीक्ष्णं विसूचिका सर्वरसगृद्धिः क्षुत्तृष्णा परिकर्तिका जीर्णे जीर्यति चाध्मानं, भुक्ते स्वास्थ्यं समश्नुते चिराद्दुःखं द्रवं शुष्कं तन्वामं शब्दफेनवद्वर्चः पुनः-

पुनः सृजति । पायुरुक् श्वासः कासश्च;(असंनि. ८) कण्ठशोषो वैरस्यं पाकाम्लता हृत्पीडा खराङ्गता दौर्बल्यं च ( चचि. १५.६०–६४ ) पित्तजग्रहणी-लक्षणम्–पायुहृदयपार्श्वद्वयोदरमस्तकेषु दाहः, नीलपीतरक्तासितवर्णैः नखविण्मूत्रनयनाननैस्तथा हृत्पाण्डूदरादिरोगाशङ्का च अस्य भवति

( सुउ. ४०.१७५ )

पीताभत्वं नीलपीताभमलसर्जनं पूत्यम्लोद्गारो हृत्कण्ठदाहोऽरुचिस्तृष्णा च ( असंनि. ८ )

कफजलक्षणानि–पायुहृदयपार्श्वद्वयोदरमस्तकेषु गौरवं, पाण्डुवर्णैर्नखविण्मूत्रनयनाननैः हृत्पाण्डू-दरादिरोगाशङ्का च अस्य भवति ( सुउ. ४०.१७७ ) अन्नं दुःखं पच्यते छर्दिररोचकः आस्योपदेहो निष्ठीवनं कासो हृल्लासः पीनसं हृदयस्त्यानत्वभावनोदरगुरुता स्तैमित्यं दुष्टमधुरोद्गारः स्त्रीष्वहर्षणं भिन्नामश्लेष्मसंसृष्टिर्गुरुवर्चःप्रवर्तनम् ( असंनि. ८ ) त्रिदोषजलक्षणानि – एतत्सर्वलक्षणोपेता ( सुउ. ४०.१७५ ) उपद्रवाः – ज्वरोऽरोचकः शूलः करपादशोफश्च ( सुउ. ४०.१७४ ) साध्यासाध्यलक्षणमतीसारवत् ज्ञेयम् ( माग्रहणी. ) सामान्यचिकित्सासूत्रम्–स्नेहनं स्वेदनं शुद्धिर्लङ्घनं दीपनं लवणक्षारमध्वरिष्टसुरासवास्तक्रयोगा दीपनानां च सर्पिषां ग्रहणीरोगिभिः सेव्याः

(चचि. १५.१९६–१९८; सुउ. ४०.१७७–१८१)

**ग्रहणीरोग**–अग्नीचे अधिष्ठान ग्रहणी. ग्रहणीचे बल अग्नि. अग्नि दुष्ट झाला तर ग्रहणी दुष्ट होऊन ग्रहणीरोग होतो. दुष्ट ग्रहणी दोषदुष्ट किंवा अदुष्ट, पक्व किंवा अपक्व अन्न पुष्कळ वेळा पक्वाशयात सोडते म्हणून पुष्कळदा तसेच शौचास होते. ते केव्हा दुर्गंधी केव्हा बांधीव केव्हा ढिले वेदनायुक्त होते. **कारणे**–अतिसार बरा झाल्यावर किंवा इतरत्र अग्नि मंद असता अग्नि दुष्ट करणारी आहार विहारादी. **पूर्वरूपे**–अन्न उशिरा पचते, घशाशी आंबट, आतड्यात गुडगुड, पोट वर येते, रुचिनाश, तोंडाला पाणी, तहान, खोकला, शरीर जड, गळाल्यासारखे, अशक्तता, आळस, थकवा, भ्रम, **सामान्य लक्षणे**–कडु, आंबट ढेकर, आमाची दुर्गंधी असलेल्या ढेकरा, लोखंडाचा धुराचा वास असलेल्याच्या ढेकरा, रुचि मुळीच नसणे, तोंड मातकट, सर्व रस खाण्याची इच्छा, तोंडाला लाळ सुटते, तहान, ओकारी, ताप, दाह, डोके, सांधे यात पीडा, मलावष्टंभ, कृशता, हातपायांना सूज व मूर्च्छा. **प्रकार चार**–१ वातज २ पित्तज ३ कफज ४ सर्वदोषज. **लक्षणे**–त्या त्या दोषांच्या चिन्हांनी युक्त वरील सामान्य लक्षणे व मुख्य लक्षण. **उपद्रव**–ज्वर, अरुचि, शूल, हातापायास सूज. साध्यासाध्यत्व अतीसाराप्रमाणे. **सामान्य उपचार**–स्नेहन, घाम काढणे, वांती, रेचक इ. शोधन, लंघन, अग्निदीपक मिठे, क्षार, मधाचे आसव, द्राक्षासव, दारू, आसव, ताकाचे योग व सिद्ध तुपे.

**–कपाट**–पु., पारदयोग० पारदगन्धकातिविषाहरीतक्यभ्रकभस्मक्षारद्वयमोचरसवचाविजयाः घटकद्रव्यत्वेन जम्बीररसे संमर्द्य औषधमेतत् क्रियते । मात्रा माषार्धम्, अनुपानम्–मधु, मधुघृतञ्च

(र. १६.१०८,१०९)

पाऱ्याचा एक योग. पारा, गंधक, अतिविषा, हिरडा, अभ्रक, जवखार, सज्जीखार, मोचरस, वेखंड, भांग, ही निंबूच्या रसात खलून औषध होते, **प्रमाण**–अर्धा मासा. **अनुपान**–मध किंवा मध तूप.

**–गजकेसरी**–पु., पारदयोग० पारदगन्धकयोः कज्जलीं द्रावयित्वा तत्र कपर्दिकाभस्म, माक्षिकं, गन्धकं च क्षिपेत् काष्ठेन च विलोडयेत् । ततश्च कदलीदले प्रक्षिपेत् । अथ समभागं स्वर्णं रसार्धं कपर्दिकाभस्म गन्धकं च द्रावयित्वा कदलीदले क्षिपेत् । उभौ संचूर्ण्य लोहपात्रे निक्षिप्य तत्र तोलकमात्रं माक्षिकं निश्चन्द्रं चाभ्रकमतिविषां दुरालम्भां मोचरसं जीरकं सर्वं समांशकं पारदाचार्धांशकं प्रक्षिप्य जयन्ती–महाराष्ट्री–भङ्गाऽश्वगन्धा-पञ्चकोलानां कषायेण भावयेत्ततश्च शुष्कं चूर्णयेत् । मात्रा–वल्लः, अनुपानम्–शुण्ठी घृतं च, पथ्यं–सघृतं दधि तक्रम्, फलम्–ग्रहण्यतीसारनाशनं दीपनमामहननं च ( र. १६.७८–९० )

पाऱ्याचा योग–पारा गंधक हे समभाग घेऊन कज्जली करून ती अग्नीवर पातळ करून तीत कवडीचे भस्म सुवर्णमाक्षिक भस्म व गंधक घालावा व लाकडी दांड्याने घोटावे, नंतर तो द्रव केळीच्या पानावर टाकून पर्पटी करावी. नंतर समभाग सुवर्ण व पाऱ्याच्या निम्मे कपर्दिक भस्म आणि गंधक घालावा. पातळ करून केळीच्या पानावर पर्पटी करावी. पुन्हा ही पर्पटी पातळ करून गंधकाने केलेले कवडीचे भस्म घालून पुन्हा पर्पटी करावी. पर्पटीचे चूर्ण करून त्यात १ तोळा सुवर्णमाक्षिक भस्म व निश्चंद्र अभ्रक

भस्म घालावे. बरोबरच वचनाग अतिविषा धमासा मोचरस जिरे सर्व समभाग पण पाऱ्याच्या अर्धा भाग मिसळून खल करावा. हळद, जलपिंपळी, गुंजामूळ, आसकंद, सुंठ, मिरी, पिंपळी, चवक, चित्रक यांच्या काढ्याच्या भावना देऊन सुकवावा. **प्रमाण** १ वाल. **अनुपान**–सुंठ व तूप. **पथ्य**–साय न काढलेले दही, ताक हितकर. **प्रमाण**–१ वाल. **गुण**–हा दीपक, पाचक, अतिशय आमघ्न, रुचि उत्पन्न करणारा, सर्वातीसारनाशक, मलबद्ध करतो पण पोट फुगवीत नाही.

**–गद**–पु., ग्रहणीरोगः ( असंनि. ८ ) ग्रहणीरोग.

**–दोष**–पु., ग्रहणीरोगः ( असंनि. ८ ) ग्रहणीरोग.

**–दोषचिकित्सित**–न., अध्याय० ( चचि. १५.१ ) ग्रहणी रोगाचे उपचार. अध्यायाचे नाव.

**ग्रहाधिपति**–पु., ग्रहस्वामी तत्संख्या नामानि च–**देवा असुरा गन्धर्वा यक्षाः पितरो भुजङ्गमा रक्षांसि पिशाचाश्च इति अष्ट** ( सुउ. ६०.६ ) ग्रहांचा स्वामी, हे आठ. नावे वर आहेत.

**ग्रहाबाध**–पु., दुष्प्रसूतायाः सूतिकाया ग्रहरोगविशेषः ( काखिल. ११ ) कष्टाने प्रसूत झालेल्या बाळंतिणीला झालेला एक ग्रहबाधारोग.

**ग्रहावेश**–पु., **ग्रहग्रहणम्, ग्रहप्रवेशः, अयमात्मनो देहप्रवेशवत्सूर्यस्य वा सूर्यकान्तमणिप्रवेशवददृश्यः** ( सुउ. ६०. १९ ) शरिरात ग्रहप्रवेश, पछाडणे, सूर्यकांतमण्यात सूर्यकिरण शिरतात किंवा आत्मा देहात शिरतो पण दिसत नाहीत तसे ग्रह शरिरात शिरतात पण दिसत नाहीत.

**ग्रहोत्पत्ति**–स्त्री., **ग्रहाणामुत्पत्तिः, तत्रेयं कथाऽनुसंधेया–शम्भुना गुहस्य रक्षणक्रीडनमनोविनोदनार्थमग्निना कृत्तिकोमाभ्यां च सहितेन स्कन्दादयो नवग्रहाः स्त्रीपुरुषशरीरा विनिर्मिताः। एते ग्रहा दिव्यशरीराः स्वावेशेनैव ज्ञायमाना न चक्षुर्विषयभूताः। तेषु स्कन्दस्कन्दापस्मारनैगमेषाः पुंविग्रहाः शकुनीरेवतीमुखमण्डिकाः पूतनात्रितयश्चेति षट्संख्याकाः स्त्रीविग्रहाः । तत्र स्त्रीविग्रहा अत्यर्थं रजस्तमोगुणाः स्कन्दादयस्तु अल्परजस्तमस्काः । तेषु शिवेन स्कन्दः पार्वत्या नैगमेषोऽग्निना स्कन्दापस्मारश्च तथैव गङ्गोमाकृत्तिकाभिश्च शकुन्यादिषट्संख्याका निर्मिताः। एते अजाननादिविचित्राकृतयः सन्ति । उत्पत्त्यनन्तरं कार्तिकेये देवसेनापतिपदत्वे समारूढे स्कन्दादयस्तदग्रे समुपस्थितास्तं स्वस्ववृत्तिं कल्पयितुमयाचन्त । ते च श्रीबाहुलेयेन शिवंप्रति संप्रेषिताः । श्रीशिवः कृतनमस्कारान् तानवोचत् । भो बालकाः श्रुणुत । एतज्जगत्त्रितयं तिर्यग्योनिमानुषदेवैश्च सहितम् । ते सर्वे परस्परमुपकारका एवं विश्वमखिलं स्वे स्वे कर्मणि नियतम् । भवन्तः सर्वे बालग्रहरक्षणार्थं संसृष्टास्तस्मात् तेषु बालेष्वेव भवतां वृत्तिरस्तु । तदपि न सर्वेष्वर्भकेषु किन्तु कुलधर्माद्याचाररहितेषु विनष्टपूजाबलिषु कुलेषु समुत्पन्नानां बालानामेव ग्रहणेनैव वृत्तिर्वर्तताम् । एतत्क्रियया भवतां बलिपूजालाभोऽपि भवेत् । एवं तेषामुत्पत्तिरुक्ता । तेषु स्कन्दग्रहोऽतीवदारुणो दुश्चिकित्स्यतमोऽन्ये तु स्कन्दापस्मारादयोऽसम्पूर्णलक्षणाश्चेत् साध्याः सर्वरूपास्त्वत्युग्रत्वाद्दुश्चिकित्स्याः। केचन स्कन्दनामा प्रथमो ग्रहः कार्तिकेय एव सोऽपि बालकान् पीडयति इति ब्रुवते–तदसत्; यतो रुद्राग्निसंभवः स्कन्दो नैव बालान् पीडयति तदनुचरा एव पीडयन्ति । स तु देवस्वभावत्वान्नमस्कारेणैव तुष्यति** ( सुउ. ३७.९–२० )

ग्रहांच्या उत्पत्तीची पौराणिक कथा–गुह म्हणजे कार्तिकेय. त्याचे रक्षण करून त्याला खेळवणे व करमणुकीसाठी शंकराने अग्नि, कृत्तिका आणि उमा यांच्या साह्याने स्कंदादि नऊ ग्रह उत्पन्न केले. यात स्कंद, स्कंदापस्मार आणि नैगमेष हे पुरुषाकृति व शकुनी, रेवती, मुखमंडिका आणि पूतना नामधारी तीन मिळून सहा ग्रह स्त्रीदेहधारी केले. स्त्रीग्रह अत्यंत रज व तमोगुणी आहेत. पुरुषग्रहात त्यांचे प्रमाण कमी आहे. शंकराने स्कंद, पार्वतीने नैगमेष आणि अग्नीने स्कंदापस्मार तसेच गंगा, उमा व कृत्तिकांनी शकुनी आदि सहा ग्रह निर्माण केले. बोकड इ. च्या तोंडासारख्या विचित्र आकृतीचे हे ग्रह आहेत. पुढे कार्तिकेय देवसेनापति झाल्यावर हे सगळे ग्रह आपल्या उपजीविकेसाठी काम काय करावे म्हणून विचारू लागले. तेव्हा त्याना कार्तिकेयाने शंकराकडे पाठवले. कार्तिकेयाच्या बाल्यावस्थेत तुम्हाला पाळले असल्याने यापुढेही तुम्ही जगातील ज्या घरात कुळधर्म कुळाचार होत नाहीत, देवादींची पूजा होत नाही त्या कुळात जन्मणाऱ्या बालकांना पीडा करून ती पीडा नष्ट होण्यासाठी मिळणाऱ्या बलि,

नैवेद्य इ. वर उपजीविका करा. तुमची यामुळे भीतीनेच जगात पूजाही होईल असे सुचविले. साध्यासाध्यत्व–त्या ९ ग्रहातील स्कंदाची पीडा फार भयंकर असते. सर्व लक्षणांची पीडा नसली तरच साध्य ! कमी असली तरी उग्रस्वभावाने उपचाराला कठिणच आहे. स्कंद हे कार्तिकेयाचेही नाव आहे. पण तो देवस्वभावी असल्याने केवळ नमस्काराने संतुष्ट होतो. त्याचे अनुचरच पीडा करतात असेही एकमत आहे.

**ग्रामजाद्रि**–स्त्री., **वनस्पति० निष्पावी** ( रापरि. ७.९९ ) आवई.

**ग्रामाघात**–पु., **मारीभयजन्यग्रामहननम्** ( सुचि. २४.९१ )
महामारीसारख्या साथीच्या वेळी भीतीने होणारा गावाचा नाश.

**ग्रामीणा**–स्त्री., **वनस्पति० पालक्यम्** ( रापरि. ७.७२ ) पालक.

**ग्राम्य**–वि., **ग्रामवासिपशुः** ( सुसू. १२.२४ ) " **अश्वाश्वतरगोखरोष्ट्रबस्तोरभ्रमेदपुच्छप्रभृतयो ग्राम्याः** ( सुसू. ४६.८५ ) **गुणाः–वातहरा दीपनाः कफपित्तलाः ( धवर्गेतर १६ ) बृंहणो रसपाकाभ्यां मधुरो बलवर्धनः** ( सुसू. ४६.८५ )
गावातले पशु–घोडा खेचर गाय इ. यांच्या **मांसाचे गुण**–गोड, पचनानंतर गोड, वातनाशक, अग्निदीपक, कफपित्तवर्धक, बलपुष्टिवर्धक.

**( ग्राम्या )**–स्त्री., **वनस्पति० नीलिनी** ( ध. १.२३२ ) काळा दाणा.
**तुलसी** ( ध. ४.५० ) तुळस.

**–कुक्कुट**–पु., **ग्रामे भवः कुक्कुटः; गुणाः–स्निग्धोष्णो, वातहा वृष्यः स्वेदस्वरबलकरो बृंहणो गुरुतरो वातरोगक्षयवमीविषमज्वरनाशनः** ( सुसू. ४६.६५–६६ )
गावकोंबडा. स्निग्ध, उष्ण, अधिक जड, वातनाशक, पौष्टिक, स्वर व शक्ति वाढवणारा, शुक्रधातूला परिपोषक, क्षय, ओकारी, विषमज्वर, वातरोग नाशक.

**–कोशातकी**–स्त्री., **वनस्पति० धामार्गवः** ( रा. ७.२८४ )
दोडके, गिलके, घोसाळे.

**–धर्म**–पु., **मैथुनम्, " मैथुनं कथ्यते सद्भिः सम्बन्धग्राम्यधर्मयोः–** " ( सुनि. ८.३ ) ( हलायुधे ८३८ ) संभोग.

**–मज्जा**–स्त्री., **स्नेह० गवोष्ट्रबस्तादीनां मज्जा, तस्याः गुणाः–मधुरा–गुर्वी–उष्णा–वातघ्नी च** ( सुसू. ४५.१३१ )
गाय, उंट, शेळी इत्यादींची मज्जा. **गुण**–गोड, जड, उष्ण, वातनाशक.

**–वल्लभा**–स्त्री., **वनस्पति० पालक्यम्** ( रापरि. ७.७२ ) पालक.

**–वास**–पु., **ग्रामे वासः, ग्रामवासाद् ग्लानिरप्रभावो वैस्वर्यं वैवर्ण्यमसुखमसुखानुबन्धश्चेति दोषाः** ( चचि. १ ( ४ ).४ )
गावात रहाणे. **दोष**–शरीर गळणे, वर्ण व स्वर बिघडणे, निस्तेज असणे, रोग होणे, व झालेला रोग सुरत जाणे असे आहेत.

**–शफ**–पु., **अश्वादीनां ग्राम्यपशूनां शफः** ( सुचि. १.९२ )
गावात राहणाऱ्या घोडा, गाढव इ. प्राण्यांचे खुर.

**–सत्त्व**–पु., **गवादिः, प्राणी** ( सुउ. ५०.१९ )
गाय इत्यादी प्राणी.

**–सत्त्वास्थिजभस्म**–न., **गवादीनां ग्राम्यपशूनाम् अस्थिजं भस्म** ( सुउ. ५०.१९ )
गाय इत्यादी गावातील पशूंच्या हाडांचे भस्म.

**–सुख**–न., **संभोगसुखम्** ( अहसू. ७.६८ )
संभोगसुख, मैथुनसुख.

**ग्रावन्**–पु., **पाषाणः, पाषाणरूपः कठिनो लोहधातुः** ( र. १०.५२ )
दगड. दगडासारखा कठिण लोखंड इ. धातू.

**ग्रास**–पु., **कवलः, घासः** ( ८.७२–७३ ) घास.
**स्वर्णादिधातूनां पारदेन ग्रसनम्** ( र. ८.७२–७३ )
सोने इत्यादी धातूंचा पाऱ्याने आत्मसात केलेला अंश किंवा पाऱ्यात घातलेला अंश.
**रत्नदोष०** ( र. ४.३६ ) रत्नातील दोष.
**औषधकाल० यदौषधं प्रतिग्रासमुपयुज्यते** ( सुउ. ६४.८० )
प्रत्येक घासाबरोबर औषध घेणे. हा औषध घेण्याचा काळच.

**–मान**–न., **एतावन्मानस्य पारदस्यैतावन्मानानां स्वर्णादिभोज्यद्रव्याणां ग्रासीकरणसामर्थ्यम्** ( र. ८.७१ )
इतक्या वजनाच्या पाऱ्याला इतक्या वजनाचे सोने इत्यादी आहार द्रव्य पचवता येईल ते प्रमाण. घासाचे प्रमाण.

**-शल्य**-न., ग्रासः शल्यमिव ( सुसू. २७.२१ ) **तत्र चिकित्साग्रासशल्यमम्बुना प्रवेशयेत् स्कन्धे वा मुष्टिनाऽभिहन्यात् । कण्ठस्थं श्लेष्माणमन्नलवं वा प्रधमनोत्काशनावकाशनैर्निर्वमेत्** ( असंसू. ३७ )
घासाचा सल. घशात सलणारा अडकलेला घास. **उपचार**-पाणी पिऊन आत गिळला जावा किंवा मानेवर बुक्की मारुन तोंडाबाहेर घास फेकला जावा असे करणे. घशातील कफ किंवा अन्नांश, घसा व तोंड मोठे करून, श्वास बाहेर जोराने टाकून शिंक आणून, खाकरून, खोकून, बोटे घालून ओढून, ओकारी आणून बाहेर काढावे.

**ग्रासान्तर**-अ., भैषज्यकाल० ( असंसू. २३ ) **प्राणे प्रदुष्टे सति ग्रासान्तरमौषधं नाम पूर्वोत्तरयोर्ग्रासयोर्मध्ये दीयते** ( चचि. ३०.३०० )
औषधाचा काळ. दोन घासांच्या मधल्या काळात; प्राणवायूची दुष्टि असताना. ( औषध देण्याचा एक काळ. )

**ग्राह**-पु., प्राणि० मकरः ( ड. सुसू. ४६.१०९ ) मगर.

**ग्राहक**-पु., वनस्पति० शितिवारः ( रा. ४.२०७ ) कुरडू.

**ग्राहणीया**-वि., उपदेष्टव्यार्थाभिधायिनी ( वाक् ) ( चशा. ८.३७ )
वाचा, वाणी, सांगावयाचे ते स्पष्ट बोलणारी.

**ग्राहिन्**-वि., मलावरोधकम् ( र. ३.१२९ ) **दीपनं पाचनं कृत्वा यद्द्रवं शोषयति तद्ग्राह्यम्** ( र. ३.१२९ )
पु., वनस्पति० कपित्थः ( ध. २.१०२ )
मळाला घट्ट करणारी वनस्पती. कवठ, अग्निदीपन व अन्न पचन करून जे औषध मळांतला द्रव शोषून घेते ते.

**( ग्राहि ) फल**-न., वनस्पति० कपित्थः ( र. ११.१५५ )
कवठ.

**-वर्ग**-पु., षड्विरेचनशताश्रितीयोक्तः प्रियङ्ग्वनन्ताम्रास्थ्यादिपुरीषसंग्रहणीयवर्गः ( चसि. ८.२४ )
मळ घट्ट करणाऱ्या वनस्पतींचा वर्ग. गव्हला, धमासा आंब्याची कोय इ.

**( ग्राहिका )**-स्त्री., चषकः ( र. ७.२१ ) पेला, वाटी.

**( ग्राहिणी )**-स्त्री., वनस्पति० कपित्थः ( र. ३.१२९ )
कवठ.

**( ग्राही )**-स्त्री., आविः, प्रसववेदना ( काजातिसूत्रीय; )
वेणा, वेण, बाळंत होण्याच्या वेळच्या वेदना.

**ग्रीवा**-स्त्री., प्रत्यंग० मन्या ( चसू. २०.८ )
शिरोधरा, चतुरङ्गुलोच्छ्राया ( सुसू. ३५.१२ ) विंशत्यङ्गुलपरिणाहा ( ड. सुसू. ३५.१२ ) **सा एकैव** ( सुशा. ५४ )
मान, मस्तक धारण करणारी चार अंगुळे उंच, २० अंगुळे घेराची ही एकच.

**-दुर्धरता**-स्त्री., ग्रीवाया मन्याया दुःखेन धारणम् ( र. ३३.१४२-१४३ )
मान न धरवणे, मान धरण्यास त्रास होणे.

**-रोग**-पु., ग्रीवाया रोगः ( चसि. २.२२ )
मानेचा रोग.

**-स्तम्भ**-पु., लक्षण० ग्रीवायाः स्तम्भः, अशीतिवातविकारेष्वेकः ( चसू. २०.११ )
मान ताठरणे, जखडणे.

**-हुण्डन**-न., लक्षण० ग्रीवास्तम्भः ( चचि. २८.२२ )
मान ताठरणे, जखडणे.

**-हृदयान्तर**-न., प्रमाणम्, द्वादशाङ्गुलम्, दीर्घायुपुरुषलक्षणम् ( सुसू. ३५.१२ )
मान व हृदय यातील अंतर १२ अंगुळे असणे हे दीर्घायुष्याचे लक्षण.

**-ग्रीवावमर्द**-पु., ग्रीवायां पीडा; रिष्टलक्षणभेदः ( असंशा. ११ )
मानेत जोराने रगडल्यासारखी पीडा. हे मरणदर्शक चिन्ह.

**ग्रीष्म**-पु., ऋतु० षडृतुष्वेकः ( चसू. ६.४ )
**ग्रसते रसान् आदानकालावरुद्धत्वेन इति ग्रीष्मः, उष्णलक्षणो ऋतुः** ( चवि. ८.१२७ ) **ज्येष्ठाषाढौ वैशाखज्येष्ठौ वा** ( सुसू. ६.७-१० )
सहा ऋतूतील एक. सर्वात उष्ण ऋतु. ज्येष्ठ आषाढ किंवा वैशाख ज्येष्ठ.

**-चर्या**-स्त्री., ग्रीष्मे आचरणविधिः, **घर्मकाले सरांसि वापीर्वनानि सकमलोत्पलाः स्रजः तालवृन्तानिलाहारान् शीतगृहाणि सुलघूनि च वासांसि निषेवेत । शर्कराखण्डादिदिग्धानि सुगन्धीनि पानकानि मन्थांश्च सशर्करान् सेवेत । शीतं सघृतं मधुरद्रवं भोजनं हितम् । रात्रौ शृतेन शर्करामधुरेण च पयसा भोजनं हितकरम् । हर्म्यसंस्थिते नूतनपुष्पास्तृते शयने चन्दनार्द्राङ्गः सुखैरनिलैः स्पृश्यमानः शयीत** ( सुउ. ६४.४१-४६ )
**ग्रीष्मऋतूत आचरणाचा विधि**-सरोवरे, नद्या, तळी, चंदनवने यांचे मध्ये रहावे, कमलांच्या माळा, थंड घरे, हलके कपडे उपयोगात आणावे. खडी साखर घातलेली सुगंधी पेये, पन्ही, पेज,

सातूचा मंथ साखर घालून घ्यावा, गोड व पातळ थंड भोजन सेवन करावे, ताडाच्या पंख्याने वारा घ्यावा, रात्री साखर घालून उकळलेल्या दुधाशी भोजन करावे, गच्चीवर ताजी फुले विखुरलेल्या गादीवर अंगाला ओले चंदन लावून वाऱ्याची झुळुक घेत झोपावे.

**-पुष्पी**-स्त्री., **वनस्पति० करुणी** ( रापरि. १०.२७ ) जिला ग्रीष्मऋतूत बारीक तांबडी सुगंधी फुले येतात अशी वनस्पती.

**-सुन्दरा**-**वनस्पति० 'गोमाशाक' कुसरीति नाम्ना प्रसिद्धः पुष्पक्षुपः** ( १६.९९-१०२ ) कुसरी.
**ग्रीष्मकर्कटीत्येके** ( ११.५२-५७ )
कस्तुरीमोगरा, बटमोगरा.

**ग्रीष्मोद्भवा**-स्त्री., **वनस्पति० वनमल्लिका** ( रा. १०.२३६ ) रानमोगरा.

**ग्रैष्म**-वि., **ग्रीष्मसम्बन्धी** ( अहृसू. १३.१४ ) ग्रीष्मसंबंधी.

**ग्रैष्मिक**-वि., **ग्रीष्मभवो ग्रीष्मसम्बन्धी वा** ( चसू. १४.१५ ) ग्रीष्मात झालेला, ग्रीष्मसंबंधी.

**ग्रैष्मी**-स्त्री., **वनस्पति० वनमल्लिका** ( ध. ५.१४० ) रानमोगरा.

**ग्लपन**-न., **अवृष्यत्वम्** ( सुसू. ४१.४ (४) शुक्रधातूला घातक.
वि., **ग्लानिकरम्, ग्लपयति ग्लानिमापादयति इति ग्लपनम्** ( अहृसू. ६.३४ ) ग्लानि करणारे.

**ग्लपित**-वि., **पीडितम्** ( अहृसू. ५.३८ ) पीडलेला.

**ग्लानि**-स्त्री., **रोग० तत्र लक्षणानि-वक्त्रमधुरता तन्द्रा हृदयोद्वेष्टनभ्रमोऽन्नाभिलषणाभावश्च** ( सुशा. ४.५४ )
अंग गळणे, तोंड गोड, झापड, भ्रम, अन्नाची इच्छा न होणे, हृदयात आवळल्यासारखी पीडा.
**सादः, म्लानत्वम्** ( सुउ. ३९.६४ )
बल कमी होणे, म्लान होणे, कोमेजणे.
**शक्त्यभावः, कर्मस्वक्षमत्वम्, मनसस्तापलक्षणम्** ( चचि. ३.३६ )
कर्म करण्याची पात्रता नसणे, अबलत्व. मनस्तापाचे लक्षण.
**मांसापचयो हर्षक्षयो वा** ( चवि. १.१८ ) ( चक्र. )
मांस क्षीण होणे. आनंद कमी होणे.
**क्लमः** ( सुशा. ३.१३ ) **रसक्षीणत्वजन्यं लक्षणम्** ( अहृसू. ११.१७ अहृसू. ९.९ )
थकवा, रसक्षीणतेचे लक्षण.

**ग्लास्नु**-वि., **ग्लायति धात्वपचयं प्राप्नोति इति ग्लास्नुः । ग्लानियुक्तः** ( चवि. १.१८ ) ग्लानियुक्त.

## घ

**घटिका**-स्त्री., **यन्त्र०** ( असंसू. ३४ ) घटिकापात्र.
**कालपरिमाण०** ( र. २.७४ ) २४ मिनिटे.

**घटितकर्णिक**-वि., **संपादिता कर्णिका यस्मिंस्तत्** ( अहृसू. १९.१४ )
गोल चकती बसविलेले, बस्तीची नळी गुदात फार आत जाऊ नये म्हणून तिला बसविलेली चकती.

**घटी**-स्त्री., **क्षुद्रघटः** ( असंसू. ३४ )
लहान घडा, कळशी, तांब्या, चंबु, लहान घागर.
**वनस्पति० अलाबूः** ( अहृसू. २५.२८ ) भोपळा.

**-यन्त्राख्यग्रहणी**-स्त्री., **रोग० ग्रहणीरोगभेदः यस्मिन् स्वपतो रोगिणः पार्श्वशूलो गलज्जलघटीवत् ध्वनिश्च । असाध्योऽयं रोगः** ( मा. )
ग्रहणीचा प्रकार. ( घडाग्रहणी ) ज्या ग्रहणी रोगात रोगी आडवा असता कुशीत फासळ्यात शूल व घागरीतून पाणी बाहेर पडत असताना होणाऱ्या आवाजासारखा आवाज होतो तो रोग. हा असाध्य.

**घट्टन**-न., **परिव० चालनम्** ( सुचि. ३.२० )
**संघर्षः** ( असंसू. ३७ )
हालणे, हलवणे, चलनवलन, घासणे.

**घण्टा**-स्त्री., **वनस्पति० अतिबला** ( रा. ४.४३० )
सर्वात मोठा चिकणा.
**नागबला** ( रा. ४.४२८ ) नागबला.

**-बीज**-न., **वनस्पति० दन्तीभेदः** ( रा, ६.३४४ )
दांती प्रकार. पहा 'दन्ती'.

**घण्टाख्य**-पु., **वनस्पति०** ( रा. ८.२३१ ) गेळफळ.

**घण्टाल**-पु., **वनस्पति० मदनः** ( रा. ८.२३१ ) गेळफळ.

**( घण्टाली )**-स्त्री., **वनस्पति० कोशातकी** ( ध. १.१९२ ) दोडके, गिलके, घोसाळे.

**घन**-वि., **स्रावरहितम्** ( अहृसू. २७.४१ )
**पिण्डीभूतम्** ( सुउ. २४.२० )
घट्ट, गोळा-पिंड; पातळ नसलेले, स्रावरहित.
**वनस्पति० मुस्ता** ( ध. १.४० ) नागरमोथा.
**उशीरम्** ( चसि. ३.१४ ) काळा वाळा.
**माषपर्णी** ( र. २.३०-३१ ) रानउडीद.
**गुडूची** ( र. २.३०-३१ ) गुळवेल.
**खनिज० लोहम्** ( ध. ६.२६ ) लोखंड, धातु.
**वङ्गम्** ( ध. ६.१३ ) कथील.
**अभ्रकम्** ( र. २.४ ) अभ्रक.

आहारद्रव्य० दधि ( चचि. १५.२२९ ) दही.

निरन्तरम्, वारंवारम् (सुउ. २०.१५ ड.) वारंवार.

**( घना )**–स्त्री., वनस्पति० **माषपर्णी** ( रा. ३.१७२ ) रानउडीद.

**गुडूची** ( र. २.३० ) गुळवेल.

**रुद्रजटा** ( रापरि. ३.२४ ) पाले मुळे मोठी असलेली सुगंधी. सुगंधी पानाची भरीव खूप पानांनी भरलेली वेल.

**–कफ**–पु., **सान्द्रकफः** ( चचि. १८.८५ ) घट्ट कफ.

**–घोष**–पु., **गम्भीरध्वनिः, गर्जना** ( असंशा. ८ ) मोठा घुमणारा आवाज, गर्जना.

**–च्छद**–न., वनस्पति० **तालीसपत्रम्** ( रा. ६.८२ ) तालीसपत्र.

**–द्रुम**–पु., वनस्पति० **विकण्टकः** ( रापरि. ११–१९) ढग येण्याचे वेळी मऊ फळे येणारी वनस्पती.

**–धूप**–पु., **बहलः धूपः** ( चचि. ३.२५९ ) पुष्कळ–दाट धूप.

**–नाद**–पु., वनस्पति० **मेघनादः** ( र. २५.१०५ ) तांदुळजा.

**तण्डुलीयम्** ( र. २५.१०५ ) तांदुळजा.

**–फल**–पु., वनस्पति० **विकण्टकः** ( रापरि. ११.२० ) पहा 'घनद्रुम'.

**–मूल**–पु., वनस्पति० **मोरटः** (रा. ३.१३ ) मोरवेल.

**–रव**–पु., **मेघनादः** ( र. २०.७५ ) तांदुळजा.

**तण्डुलीयम्** ( र. २०.७५ ) तांदुळजा.

**–रस**–पु., वनस्पति० **वालकम्** ( र. २०.६८–७४ ) वाळा.

**मूर्वा** ( र, २०.६८–७४ ) मोरवेल.

**–वल्ली**–स्त्री., वनस्पति० **अमृतस्रवा** ( रापरि. ३.४५ ) गुळवेल.

**–सार**–पु., सुगन्धिद्रव्य० **कर्पूरः** ( र. १८.२११ ) कापूर.

**–सारक**–पु., सुगन्धिद्रव्य० **कर्पूरः** ( रा. १२.५६ ) कापूर.

**–स्पर्शत्व**–न., **निबिडस्पर्शता, हस्तादिना स्पृष्टे सति पाषाणतुल्यः स्पर्शः** ( अहसू. २९.९ ) कठीण, भरीव स्पर्श लागणे, दगडासारखा स्पर्श.

**–स्वन**–पु., वनस्पति० **तण्डुलीयकः** ( ध. ४.११६ ) तांदुळजा.

**घनात्यय**–पु., ऋतु० **शरदृतुः** ( चसू. ६.४३ ) शरदृतु.

**हेमन्तः** ( चशा. २.४५ ) हेमंत ऋतु.

**घनान्त**–पु., **शरदृतुः** ( अहसू. ३.५६ ) शरदृतु.

**घनाश्मस्वेद**–पु., **स्वेदचिकित्साविशेषः, तद्विधिः– पुरुषायाममात्रमधिकं वा घनं समं च शिलातलं भूप्रदेशं वा वातहरदारुदीप्तेनाग्निना सर्वतस्तापयित्वा अग्निमपोह्योष्णोदकाम्लादिभिरभ्युक्ष्य यथोक्तप्रच्छदे संस्तरवत्स्वेदयेदिति** ( असंसू. २६ ) घाम आणण्यासाठी शेकण्याचा एक प्रकार. दगडाने शेकणे; पुरुषाच्या लांबी रुंदीपेक्षा जास्त अशा शिळेवर किंवा जमिनीवर वातहर लाकडे जाळून निखारे काढून आंबट द्रव उष्ण पाण्याने काढ्याने शिंपडून त्यावर चादर टाकून रोग्याला निजवून पांघरूण घालून घाम काढणे.

**–घनोदय**–पु., **मेघागमनकालः** ( असंसू. ४.४६ ) मेघ–ढग येण्याचा काळ.

**घर्म**–पु., **घरति अङ्गाज्जलमनेनेति घर्मः, आतपः** ( चचि. ७.११८ ) ऊन्ह, ऊन.

**स्वेदः** ( र. १२.१७–१९ ) घाम.

ऋतु० **ग्रीष्मः** ( अहसू १६.१३ ) ग्रीष्म ऋतु.

**–मास**–पु., कालविभाग० **अत्र पश्चिम इति विशेषण- मनुसन्धेयम्; तेन पश्चिमो घर्ममासो ज्येष्ठ इति चक्रः साधुः। ज्येष्ठमासः** ( चवि., ३.३ ) ज्येष्ठ महिना.

**घर्मांशु**–पु., **सूर्यः** ( सुउ. १७.६४ ) सूर्य.

**घर्मान्त**–पु., **वर्षाकालः** ( सुसू. २१.२० ) पावसाळा, वर्षाऋतु, वर्षाकाल.

**घर्माम्बु**–न., **उष्णजलम्** ( चचि. ३.१९४ ) ऊन पाणी.

**प्रस्वेदः** ( सुउ. १७.५५ ) घाम.

**घर्मूटी**–वि., धान्य० ( सुसू. ४६.२१ ड ) एक तृणधान्य.

**घर्ष**–पु.,**घर्षणम्** ( अहसू. २३.१ ) घर्षण, घासणे.

**परस्परसंश्लेषः** ( अहसू. २३.६ ) परस्पराशी चिकटणे ( पापण्या )

**घर्षणी मुसली घृष्यते घर्षणविषयीक्रियतेऽनेनेति घर्षः** ( र. ९.८४ ) खलण्याचा बत्ता. वरवंटा.

**घर्षण**–न., **मर्दनम्** ( असंसू. ३ ) मर्दन, घासणे.

**( घर्षणी )**–स्त्री., **द्वादशाङ्गुलोत्सेधा खल्वमध्ये मर्दनार्थ- मुपयुज्यमाना दण्डाकारा शिला, मुसली वा** ( र. ९.८० ) बत्ता. बारा अंगुळे उंच दगडाची मुसळी. औषध खलण्याच्या उपयोगाची.

**घर्षिणी**–स्त्री., वनस्पति० कांचनक्षीरी ( ध. १.२४० )
पिवळा धोत्रा, पिसोळा.

**घस्मर**–वि., बहुभक्षकः ( चसू. १३.५० )
घसति भक्षयति विशेषेणेति
खादाड, फार खाणारा.

**घस्र**–पु., दिवसः घसति भक्षयति अन्धकारमिति घस्रः
दिवस.

**( घस्री )**–स्त्री., घर्षणी ( र. ९८.४ )
घासणारी ( खलणारी ) मुसळी.

**घाटा**–स्त्री., शारीरज अन्तःकण्ठस्थमस्थि, अवटुः
( चसू. १७.१९ ) घाटी. गळ्यातले हाड.
ग्रीवायाः पश्चाद्भागः ( चसि. ९.८४ )
मानेच्या मागचा भाग.
शङ्खस्योपरिभागः ( असंउ. २७ )
कानशिळाच्या वरचा भाग.

**घाटाल**–वि., उन्नतपर्यन्तः, यस्य घाटा नामोर्ध्वभागो महानस्ति सः ( सुनि. ९.१०.११ )
ज्याची कडा उंच–वर उचललेली व मोठी असते तो.

**घुण**–पु., कृमि० ( र. ३०.११५ ) एक कृमि.
**–दन्त**–पु., विवरयुक्तो दन्तः ( कासू. २०.८ )
भोंक असलेला–पोकळ दात.
**–प्रिया**–स्त्री., वनस्पति० अतिविषा
( अहृसू. १५.३३ ) अतिविष.

**घुणाक्षर**–न., काष्ठकीटदशनजनिताक्षरम्, घुणाख्येन कीटकेन काष्ठक्षरणपूर्वकं कृतं रन्ध्रमक्षरविशेषसमत्वादतर्कितोपनतत्वं काकतालीयत्वं वा सूचयति
( र. ३०.११५.१६ )
लाकूड कोरणाऱ्या किड्याच्या पोखरण्याने बनलेले अक्षर.

**घुर्घुरक**–पु., मार्जारशब्दानुकारी ध्वनिः ( सुक. ४.३७ )
स कफावरुद्धेन श्वासेन भवति ( चइ. १०.१८ )
घुर्घुर. मांजराच्या शब्दासारखा आवाज कफाने अडविलेल्या श्वासाने होतो.

**घुर्घुराशब्दः**–पु., घुर्घुरकः, घुर्घुराकारशब्देन वेदनया युक्तम् ( सुसू. २८.१६.१७ )
घुरघुर शब्द. किंवा वेदनायुक्त.

**( घुर्घुरिका )**–स्त्री., लक्षण० ( चचि. १२.७५ )

**घुसृण**–न., वनस्पति० कुङ्कुमम् ( रा. १२.२१ ) केशर.

**घूकावास**–पु., वनस्पति० शाखोटः ( रानि. ९.३० )
पिवळा भूर्जपत्र. साग, हेदी.
आ. को. म. ६९

**घूर्णन**–न., भ्रमणम् ( असंउ. ४३ )
भ्रमण, फिरणे.
लक्षण० चक्रवद् भ्रमणं, निद्रायां लुण्ठनम्
चक्राप्रमाणे वाटोळे फिरणे. झोपेत लोळणे.

**घृत**–न., स्नेह० ( चसू. २७.२३१–३२ ) ( ध. ६.१४४ ) महास्नेहेष्वेकम् ( चसू. १.८६ )
उत्पत्तिः–गोमहिष्यादीनां दुग्धात् तज्जदध्नो वा स्नेहसाररूपेण घृतं पृथग्भवति नवनीतस्याग्निसंस्कारेण घृतं जन्यते ( अहृसू. ५.३७ ) मधुरस्कन्धे श्रेष्ठम् ( असंसू. १८ ) गुणाः–मधुरं सौम्यं मृदुशीतवीर्यमल्पाभिष्यन्दि स्नेहनमुदावर्तोन्मादापस्मारशूलज्वरानाहवातपित्तप्रशमनमग्निदीपनं स्मृतिमेधाकान्तिस्वरलावण्यसौकुमार्यौजस्तेजोबलकरमायुष्यं वृष्यं मेध्यं वयःस्थापनं गुरु चक्षुष्यं श्लेष्माभिवर्धनं पाप्मालक्ष्मीप्रशमनं विषहरं रक्षोघ्नं च ( सुसू. ४५.९६ ) पित्तेऽभ्यधिकं घृतं लिह्याद्वातेऽधिकं घृतं पिबेत् ( असंचि. ५ ) शैत्यात्पित्तं जयेत् स्नेहाद्वातं जयेत् योगसंस्कारतः कफं जयेत् ( असंचि. २ ) वातपित्तप्रशमनानामग्र्यम ( चसू. २५.४० ) सर्पिः खलु पित्तं जयति सततमभ्यस्यमानं माधुर्याच्छैत्यान्मन्दत्वाच्च, पित्तं ह्यमधुरमुष्णं तीक्ष्णं च, तस्मात्सर्पिः पित्तजित ( चवि. १.१४ ) घृतपानं पित्तशूलशमनम् ( सुउ. ४२.१०६ ) धीस्मृतिमेधाग्निकांक्षिणं घृतं शस्यते ( असंसू. २५ ) श्रेष्ठं विषहरं ( असंउ. ४० ) घृतं क्षीरस्य रसादिभिस्तुल्यमपि विशेषतो दीपनम् ( असंसू. १७ ) भोजनादावन्ते च क्षुतिनिग्रहजविकारशमनार्थं घृतसेवनं प्रशस्तम् ( चसू. ७.१७ ) इदं संस्कारात् कर्मसहस्रकृत् ( अहृसू. ५.३९ ) हितत्वेनाभ्यस्यमानमेकं द्रव्यम्, स्नेहनार्थं वर्षान्ते शरदि च घृतं युज्यते ( असंसू. २५ ) घृतात्तैलं गुरु तैलाद्वसा वसायाश्च मज्जा गुरुः ( असंसू. २५ ) मज्जावसातैलेभ्यो घृतं संस्कारस्यानुवर्तनात् माधुर्यादविदाहाच्च श्रेष्ठम् ( असंसू. २५ ) पित्तेऽपि केवलं सर्पिर्न पेयं सामे तु विशेषतो नोपयोक्तव्यम् उपयुक्तं चेत् सर्वदेहोपघातं कृत्वा संज्ञामपि मारयेत् ( असंसू. २५ )

महास्नेहातील एक मधुर वर्गात विषनाशक व वातपित्त जिंकणाऱ्या द्रव्यात श्रेष्ठ. बुद्धि निर्णयशक्ति धारणाशक्ति चांगली व अग्नि प्रदीप्त असावा असे

इच्छिणारांनी तुपाचे नित्य सेवन करावे. निरनिराळ्या द्रव्यांच्या संस्काराने हजारो कर्मे करणारे एक द्रव्य. **गुण**–मधुर गुरु सौम्य शीत मृदु अग्निदीपक वातपित्तशामक कफवर्धक पण कफहर द्रव्यांच्या संस्काराने कफनाशक. शुक्र धातु, नेत्र यांना हितकर. स्मृति, धारणाशक्ति, कांति, स्वर, सौंदर्य, सुकुमारत्व, तेज, ओज, बल, आयुष्य वाढविणारे, तारुण्य कायम ठेवणारे, तोंडावर प्रसन्नता ठेवणारे, मानसिक दोष नाशक. शरीर स्निग्ध करणारे, वायूची वरची गति शमन करणारे, उन्माद, अपस्मार, शूल, ज्वर, पोटफुगी कमी करणारे, भूतबाधाहर. तूप पित्तशमनासाठी चाटावे. वातशमनासाठी प्यावे. तूप, थंड, मधुर, मंद गुणाचे म्हणून पित्तशामक स्निग्ध म्हणून वातशामक व कफनाशक द्रव्यांचा संस्कार केला तर कफनाशक. पित्तशूलावर तूप प्यावे. दूध व तूप रसवीर्यादि गुणांनी समान पण तूप हे अग्निदीपक, शिंका रोकल्या तर होणाऱ्या विकारावर प्रशस्त. शरिराला हितकर म्हणून नित्य सेवन करण्यासारखे एक द्रव्य. शरीर स्निग्ध करण्यास वर्षाऋतूच्या शेवटी व शरद ऋतूत घृत प्यावे. तूप तेल वसा मज्जा क्रमाने अधिक जड आहेत. सर्वात तूप गोड असून विदाह (अम्लता) करीत नाही म्हणून श्रेष्ठ. विशेषतः आमयुक्त पित्तावर केवळ तूप घेऊ नये. संस्कार केलेले औषधिसिद्ध तूप ध्यावे, तसे न केल्यास सर्व शरिराचा व संज्ञा यांचा नाश करून मारते.

**–पर्ण**–पु., **वनस्पति० करञ्जः** ( ध. ५.१०७ ) करंज.

**–पर्णक**–पु., **वनस्पति० करञ्जः**
( ध. ५.१०७ **रा.** ९.१७८ ) करंज.

**–पान**–न., **सर्पिषः सेवनम्** ( सुउ. २१.३ )
तुपाचे सेवन, तूप पिणे.

**–पानार्ह**–पु., **परिव० घृतपानार्थं योग्यः**
( सुचि. ३१.१५ ) तूप पिण्यास योग्य.

**–पूर**–पु., **आहारद्रव्य० घृतापूपः**
( सुउ. ४२.१०१–१०२ ड. ) ( सुउ. २६.३८ )
**गुणाः–प्राणकरो हृद्यः कफावहो वातपित्तहरो वृष्यो गुरू रक्तमांसकृच्च** ( सुसू. ४६.३९४ )
तुपात केलेले–तळलेले पदार्थ. अनारसा. घीवर इ. जगण्याची शक्ति वाढविणारा, जड, कफकर, वात-पित्तहर, शुक्रधातु हृदय यांना हितकर, रक्तमांस वाढविणारा.

**–मण्ड**–पु., **स्त्यानघृतोपरितनः स्वच्छो भागः**
( सुचि. ३४.१३ ) **गुणाः–अयं घृततुल्यगुणोऽपि रौक्ष्यतैक्ष्ण्यतनुत्ववान्** ( असंसू. ६.७८ )
**घृतसंतानिका** ( चचि. २१.९४ ) **घृतस्योपरि स्त्यानभागः** ( चक्र चचि. १८.१५५ )
घट्ट तुपावरचा स्वच्छ पातळ भाग. **गुण**–तुपासारखेच पण रूक्ष तीक्ष्ण व पातळ असतो. तुपावरची साय. तुपाच्या मंडावर–पातळ तुपावर असलेली साय.

**–मण्डलिका**–स्त्री., **वनस्पति० हंसपादी**
( ध. ४.१११ ) हंसपदी.

**–सात्म्य**–वि., **घृतोपशयः** ( काखिल. ५.४८ )
तूप विकारकर न होता आत्मसात् होणे. ज्याला तूप आत्मसात् झाले आहे तो. ज्याला तूप पचते तो.

**–सिद्धिलक्षण**–न., **परिव० सम्यक्सिद्धं घृतं, तस्य लक्षणम्, शब्दफेनयोरुपशमो गन्धवर्णरसादिसमृद्धिश्च** ( सुचि. ३१.१२.१३ )
औषधांनी तूप तयार झाल्याचे लक्षण–तुपात होणारा आवाज व फेस बंद होणे. औषधांना अनुसरून योग्य असा वास रंग रस इत्यादी व्यक्त होणे.

**–हेतु**–पु., **नवनीतम्** ( ध. ६.२२९ )
तुपाचे कारण–कारणरूप द्रव्य. लोणी.

**घृणाफल**–पु., **वनस्पति० कलिङ्गः** ( रा. ७.२७१ )
कलिंगड.

**घृताभ्यक्त**–वि., **घृतावचारितम्** ( सुचि. ६.४ )
तूप अंगाला लावणे, तूप चोपडलेला.

**घृताची**–स्त्री., **वनस्पति० एला** ( रा. ६.७१ )
वेलदोडा.

**घोटी**–स्त्री., **वनस्पति० घोण्टा** ( रापरि. ८.२२ )
क्षुद्र बोर.

**घोणा**–स्त्री., **घोणतो भ्रमतः प्राणापानवायू अनया इति घोणा, यद्वा घोणाति गृह्णाति वस्तुगन्धमिति घोणा । शारीर० नासा** ( सुचि. १८.२६ ) नाक.

**घोण्टा**–स्त्री., **वनस्पति० गुणाः–कटुका मधुरोष्णा वातघ्नी व्रणकण्डूतिकुष्ठासृग्दोषश्वयथुनाशिनी**
( रापरि. ८.२२ )

हिं.—झरबेर.

**म.**—**चन्याबोर.**

गु.—गांगोर.

**बं.**—**सेयाकुळ.**

चन्याबोर, लहान बोर. तुरट, गोड, उष्ण, वात-नाशक, व्रण, खाज, कुष्ठ, रक्तदोष, सूज नाशक.
**पूग०** ( अरु. अहृसू. १५.१७ ) सुपारी.
**वनबदरीविशेषः** ( र. २५.१९ ) रानबोर.

**–फल**–न., **वनस्पति० पूगफलम्** ( ध. ३.३९ ) सुपारी.

**घोर**–वि., **दारुणम्** ( सुनि ९.४ ) भयंकर.

**( घोरा )**–स्त्री., **वनस्पति० देवदाली** ( रा. ३.२४३ ) देवडांगरी.

**–पुष्प**–न., **खनिज० कांस्यम्** ( रा. १३.२४ ) कांसे.

**–फडा**–स्त्री., **प्राणि० गोधा** (धपरि. ६.३९ ) घोणस.

**घोल**–न., **आहारद्रव्य० दण्डाहतं सस्नेहमजलं दधि** ( सुसू. ४५.८५ )
पाणी न घालता घुसळलेले साईसकट दही.

**( घोला )**–स्त्री. **वनस्पति० घोली** ( रापरि. ७.८७ ) घोळ ( भाजी ).

**घोलिका**–स्त्री., **वनस्पति० घोली** ( रापरि. ७.८७ ) घोळ ( भाजी )

**( घोली )**–स्त्री., **वनस्पति० गुणाः–अम्ला लवणा रुच्या वातकफापहा च** ( रापरि. ७.८७ )
हिं.—नोंनिया लुणियाशाक.
**म.—घोळ.**
गु.—लुणी झिणी.
बं.—णुनी.
त.—परप्पुक्कीरै.
फा.—खुरफा.
घोळ ( भाजी ) आंबट, खारट, रुचकर, वातकफ-नाशक.

**घोष**–पु., न., **आहतं सदितरापेक्षया अधिकतरं घोषति शब्दं करोति इति घोषं कांस्यमिति साधीयो निर्वचनम्। खनिज० कांस्यम् घ. झ. ढ. ध. भाः इति वर्णाः** ( चशा. ८.५० ) ( च. ६.२३ ) कांसे.
ज्यावर आघात केला असता इतर पदार्थापेक्षा फार मोठा आवाज होतो तो घोष. असा कांसे हा धातु आहे म्हणून त्याला हे नाव योग्य ठरते. घ. झ. ढ. ध. भ. ही घोष व्यंजने होत.

**( घोषा )**–स्त्री., **वनस्पति० शतपुष्पी** (ध. २.१) बडीशेप.
**वनस्पति० कर्कटशृङ्गी** ( रा. ६.११० ) काकडशिंगी.
**कोशातकी** ( र. १०.७३–७६ )
दोडके, घोसाळे, गिलके.

**–पुष्प**–न., **खनिज० कांस्यम्** ( ध. ६.२३ ) कांसे.

**घोषाकृष्ट**–न., **चतुर्थांशेन हरितालेन युक्तं कांस्यं वङ्कनालेन ताडयित्वा वङ्गाद्विमुच्य ताम्रावशिष्टं विधीयते, तदेयं संज्ञा** ( र. ८.३८ )
चवथा हिस्सा हरताळ काशात घालून वंकनालाने दिव्याच्या ज्योतीवर वाकड्या नळीने तोंडाने हवा सोडून उत्पन्न होणाऱ्या अधिक उष्णतेने–धातूंवर डाग लावतात. ती नळी; किंवा भाता अग्नीत फुंकून त्यातील कथील जळून वेगळे होऊन, तांबे उरते. ते काशातून काढलेले तांबे म्हटले जाते.

**घ्राण**–न., **शारीर० पञ्चबुद्धीन्द्रियेष्वेकम्** ( चशा. ७.७ )
**घ्राणेन्द्रियं तच्च पार्थिवम्** ( चशा. ७.१६ )
**जिघ्रतीत्यनेन घ्राणम्** ( चसू. ८.८ ) **तस्य पृथिवी द्रव्यं, नासिकायामधिष्ठानं, गन्धो विषयः, घ्राणबुद्धिरिन्द्रियबुद्धिः** ( चशा. ७.७ ) **वहिर्मुखं स्रोतः देहे द्वे नासाद्वारे बहिर्मुखे स्रोतसी** ( सुशा. ५.१० )
**कफस्थानेष्वेकम्** ( अहृसू. १२.३ )
एक ज्ञानेन्द्रिय. वास घेणारे ते घ्राण. पृथ्वी महाभूताधिक्याचे पृथ्वी हे त्याचे द्रव्य. नाक हे अधिष्ठान. वास हा त्याचा विषय; वासाचे ज्ञान ही इंद्रिय बुद्धि. नाक हे बाहेर तोंड असलेले एक स्रोतस आहे. त्याची दोन तोंडे ( दोन नाकपुड्या ) हे एक कफ स्थान.

**–क्लेद**–पु., **नासिकास्थद्रवमलः** ( असंसू. २९ )
नाकातून वाहणारा द्रव मळ; शेंबूड.

**–गन्ध**–पु., **लक्षण० नासास्थपूतिगन्धः** ( चसू. ५.२९ )
नाकाची घाण. वाईट कुजका वास.

**–नाश**–पु., **रोग० गन्धग्राहकघ्राणेन्द्रियस्य नाशः** ( चसू. २.६ ) **अशीतिवातविकारेष्वेकः** ( चसू. २०.२१ )
वास घेणारे इंद्रिय; त्याचा नाश. ऐंशी वातविकारातील एक.

**–प**–वि., **घ्राणेन धूमं पिबति** (चसू. ५.४७ )
नाकाने धूर पिणारा.

**–पाक**–पु., **रोग० नासारोगः** ( चचि. २६.११५ )
**संप्राप्तिः–पित्तं स्वहेतुना नासापुटे कुपितं दाहशूलाभ्यां युक्तं तत्रैव त्वङ्मांसं पचेत् स घ्राणपाकः** ( असंउ. २३ )

नाकाचा रोग. **संप्राप्ति**–स्वतःच्या कारणांनी प्रकुपित झालेले पित्त नाकपुड्यात दाह शूल करून तेथेच त्वचा व मांस याना पिकविते, ते नाक पिकणे होय.

**–मार्ग**–पु., **नासामार्गः** ( असंशा. ७.२३ )
नाकातील मार्ग.

**–स्रव**–पु.. **लक्षण० नासास्रवः, अतिस्नेहपानजलक्षणेष्वेकम्** ( अहृसू. १६.३१ )
नाकातून होणारा स्राव; अति स्नेहपानामुळे झालेले लक्षण.

**घ्राणार्बुदयन्त्र**–न., **यन्त्र० तन्नाड्याकारं व्यङ्गुलायतमेकच्छिद्रं प्रदेशिनीपरिणाहम्, नासार्बुदे दर्शनार्थं चिकित्सार्थं चोपयुज्यते** ( असंसू. ३४ )
नळीसारखे एका छिद्राचे आंगठ्याजवळच्या अंगुळीच्या घेराइतके दोन अंगुळे लांब असे यंत्र. नाकात आवाळू झाले असता पाहण्यासाठी व उपचाराकरिता योजितात.

**घ्राणार्शोयन्त्र**–न., **यन्त्र०, घ्राणार्बुदयन्त्रवत् इदं यन्त्रमवगन्तव्यम्** ( असंउ. ३४ )
घ्राणार्बुद यंत्रासारखे यंत्र.

**घ्रातृ**–वि., **घ्राणेन्द्रियस्य गन्धबोधहेतुः, गन्धज्ञाता** ( सुशा. ३.४ )
वास घेणारा, वास जाणणारी. घ्राणेंद्रियाच्या वासाच्या ज्ञानाला कारणीभूत.

**घ्रेय**–वि., **घ्राणक्रियार्हम्** ( चक. १.२८ )
वासाला योग्य. वास घेण्यासारखे.

## च

**चकोर**–पु., पक्षि० ( चसू. २७.४७ )
**अयं रक्ताक्षः, विष्किरेष्वेकः** ( सुसू. ४६.५९ ) **विषसंसृष्टमन्नं दृष्ट्वा चकोरस्याक्षिवैराग्यं जायते** ( सुक. १.३०,३१ ) **तस्याण्डं क्षीणरेतःकासहृद्रोगक्षतेषु हितम् । तन्मधुरमविदाहि सद्यो बलकरं च** ( चसू. २७.८५ ) **अस्य मांसगुणाश्चटकमांसवत्** ( अहृसू. ६.४४ )
चकोर. हा लाल डोळ्यांचा. उकरून भक्ष्य शोधून खाणारांपैकी एक पक्षी. विषयुक्त अन्न पाहून त्याच्या डोळ्याची लाली नाहीशी होते. त्याचे अंड शुक्रक्षीणता, खोकला, हृद्रोग, उरःक्षत या विकारावर चांगले. ते गोड आंबट घशाशी येणे ही विकृति करीत नाही, तावडतोब बल निर्माण करिते.
**मांसाचे गुण**–चिमण्याच्या मांसाच्या गुणाप्रमाणे.

**चकोराक्षि**–न., **चकोरपक्षिणो नेत्रम्, विषं दृष्ट्वा तद्विरज्यते** ( चचि. २३.११० )
चकोराचे डोळे. विष पाहून त्यांची लाली जाते.

**चक्र**–न., **पानीयोद्धरणार्थं नियुक्तं वाह्यमानं चक्राकारं यन्त्रम्** ( चचि. १५.२१ )
पाणी वर काढण्याकरिता गोल फिरणारे चाकाच्या आकाराचे यंत्र, रहाट.
**तैलनिष्पादनार्थं तिलनिष्पीडनयन्त्रम्** ( सुसू. ४४.४७ )
तेल काढण्याकरिता तीळ पिळण्याचे यंत्र, घाणा.
चक्र न., (सुसू. ४४.४७) (चचि. १५.२१) चाक.

**–( चक्र )-गज**–पु., **वनस्पति० चक्रमर्दः** ( रा. ४.८ ) टाकळा तरोटा.

**–चापसमुद्भवा**-स्त्री., **वनस्पति० भूतुम्बी** ( रा. ७.२४१ )
दुध्या भोपळ्याचा प्रकार.

**–तैल**–न., **चक्रपीडितं तैलम्, चक्रे ह्यभृष्टा एव तिलादयः पीड्यन्ते चेत्, ते गुणवत्तरा भवन्ति** ( सुसू. ४४.४७–४८ ) **अन्ये पुनरणुतैलकल्पेन गृहीतमपक्वं तैलं चक्रतैलमाहुः** ( सुचि. ३.१२ )
घाण्यातून ताजे काढलेले तेल. तीळ न भाजता काढलेले तेल अधिक गुणाचे. घाण्याची तेलाने भरलेली लाकडे लहान तुकडे करून ती पाण्यात उकळून पाण्यात उतरलेले तेल चक्रतेल होय. असे एक मत. या तेलास अणुतेल ही म्हणतात.

**–दन्तीबीज**–न., जेपालः ( रा. ६.३४४ ) जयपाळ.

**–नख**–पु., **व्याघ्रनखम्** ( रा. १२.११० )
वाघाचे नख.

**–नाभि**–स्त्री., **चक्रस्य मध्यभागः** ( सुशा. ७.५ )
चाकाचा तुंबा.

**–नायक**–पु., **व्याघ्रनखम्** ( रा. १२.११० )
वाघाचे नख.

**–मर्द**–पु., **वनस्पति०, गुणाः—कटुरुष्णः कान्तिसौकुमार्यकरो मेदोघ्नो वातकफनाशनो दद्रुकण्डूतिव्रणकुष्ठपामाघ्नश्च** ( ध.४.४ )
हिं.—चकवड, पमार.
**म.—टाकळा.**
गु.—कुवाडियो.
बं.—पनेवार, चकुण्डा.
त.—तकरै.
फा.—संजिमवोया.
टाकळा, तरवटा, कडु, उष्ण, वातकफनाशक, कान्ति व सुकुमारत्व करणारा, मेदनाशक, गजकर्ण, कण्डु, कुष्ठ, खरूज व व्रणनाशक.

**–मर्दिनी**–स्त्री., **वनस्पति० अलवतकः** ( रापरि. ६.१२ ) अळिता, लाख.

**–मुद्गक**–पु., **ऋषिमुद्गकः** ( चसू. २१.२५ ) रानमूग.

**–यन्त्र**–न., **यन्त्र० गर्ताकारयन्त्रम्** ( र. २५.५७, ५८ )
गोल खळगा असलेले यंत्र.

**–योग**–पु., **बन्ध०; वर्तुलकुशादानपूर्वकं चक्रवद्बन्धनम्; भग्नं पुरुषं भूमावुत्तानं शाययेत् । यस्य पादस्योर्वस्थि निर्गतं स्यात्तस्यैव पार्ष्णिभागो बलव**

वैद्येन स्वहस्तोपरि ग्रहीतव्यः । ततश्च चक्रवद्भ्रामतो दक्षिणं परिभ्रमणीयः । एवं कृते विमुक्तः ऊरुः पुनः स्वस्थानं प्रतिपद्यते ( सुचि. ३.२७ )
एक पट्टा. वाटोळा दर्भ गुंडाळून त्यावरून चाका-सारखाच वाटोळा पट्टा बांधणे. ज्याच्या मांडीचे हाड निखळले आहे त्याला जमिनीवर उताणे निजवून त्याची खोट बलवान वैद्याने हातात धरून, नंतर डावीकडून उजवीकडे वाटोळा फिरवावा म्हणजे निखळलेले हाड जागेवर येईल. नंतर पट्टा बांधावा.

**–लक्षणा**–स्त्री., **वनस्पति० गुडूची** ( ध. १.२ )
गुळवेल.

**–लताम्र**–पु.,**आम्रभेदः राजाम्रः** (रा. ११.११ )
उत्कृष्ट आंबा.

**–वर्तिन्**–पु., **वनस्पति० वास्तुकम्** ( रापरि. ७.६२ )
चाकवत.

**–( वर्तिनी )**–स्त्री., **वनस्पति० जन्तुका** ( ध. ४.८८ )
अळिता, लाख.
**जटामांसी** ( रा. १२.९१ ) जटामांसी.

**–वाक**–पु., **पक्षि० जलचरोऽयं** ( चसू., २७.४४ ) **द्वन्द्वचरो निशावियोगी, प्लवजातीयः** ( सुसू. ४६.१०५, १०६ ) **मांसगुणाः– स्निग्धं गुरु शुक्रलं बल्यं रुच्यं वातघ्नं च** ( ध. ६.४५४)
जलचर पक्षि. नरमादी जोडीने असणारे. रात्री दोघांचा वियोग होतो. **मांसाचे गुण**–स्निध, गुरु, वातनाशक, शुक्रवर्धक, बलकर, रुचकर.
हिं.—चकवा.
बं.—रामचका.
**म.—चक्रवाक.**

**–वेधक**–न., **आसुत० सूक्तम्** ( रा. १५.२९२ )
शिरका.

**चक्रक**–पु., **वनस्पति० करीरः** ( ध. ५.९९ )
नेपती–नेवती.

**( चक्रका )**–स्त्री., **सोम० सोमसमवीर्यमहौषधिः, 'श्वेतां विचित्रकुसुमां काकादन्यासमां क्षुपाम् । चक्रकामोषधीं विद्याज्जरामृत्युनिवारिणीम् ॥'** ( सुचि. ३०.१८–१९ ) **चक्रकायाः पयः सकृदेवोपयोक्तव्यम्** ( सुचि. ३०.५ )
सोमासारखी वीर्यवान् महौषधि. काकादनी ( कावळीचा प्रकार ) सारखे लहान झाड, पांढरी, चित्रविचित्र फुलांची दुधाळ वनस्पती. हिचे दूध एकदाच घ्यावे. वार्धक्य व मृत्युहर.

**( चक्रा )**–स्त्री., **भैषज्य० कर्कटशृङ्गी** ( ध. १८५)
काकडशिंगी.

**चक्राङ्गा**–स्त्री., **वनस्पति० मुस्ता** ( रा. ६.६१ )
नागरमोथा.

**चक्राङ्गी**–स्त्री., **वनस्पति० कटुका** (ध., १.३८ ) कुटकी.
**सुदर्शनलता अम्लवास्तुकम्** ( २१.१०४–११० )
आंबट चुका.

**चक्राह्व**–पु., **वनस्पति० चक्रमर्दः** ( ध. ४.४ )
तरोटा टाकळा.
**चक्रवाकः** ( सुसू. ६.३०.३१ ) पहा 'चक्रवाक'.

**( चक्रिका )**–स्त्री., **वनस्पति० चक्रमर्दः** ( ध. ४.४ )
तरोटा, टाकळा.
**चक्राकृतिर्वटिकादिः** ( र. ५.१२६ )
चाकाच्या आकाराची वडी. चकती.

**–बन्ध**–पु., **भैषज्य० गन्धकमनःशिलाहरितालयुक्तः** ( र. २२.२४–२९ ) **शूलगुल्मभगन्दरग्रहण्युदरादिहरः**
एक औषध. गंधक, मनशील, हरितालयुक्त; शूल, गुल्म, भगंदर, ग्रहणी, उदरहर.

**चक्रिन्**–पु., **वनस्पति० तिनिशः** ( रापरि. ९.२४ ) तिवस.

**( चक्री )**–स्त्री., **वनस्पति० चक्रमर्दः** ( ध. ४.५ )
तरोटा, टाकळा.
**चक्रिका** ( र. २.१९ ) चकती.
**व्याघ्रनखम्** ( रा. १२.११० ) वाघाचे नख.

**चक्षुस्**–न., **शारीर० चष्टे आचष्टे रूपमिति चक्षुः, शारीर० पञ्चबुद्धीन्द्रियेष्वेकम्, तच्च तैजसम्,** ( चशा. ७.७ ) **तस्य तेजो द्रव्यं शिरःसंश्रयस्थानं नेत्रेऽधिष्ठानं रूपं विषयः, रूपबुद्धिरिन्द्रियबुद्धिः** ( चशा. ७.७ ) **पित्तस्थानेष्वेकम्** ( अहसू. १२.३ ) **तच्चोभयनयनगोलकाधिष्ठितमेकमेव** ( चसू. ८.८ )
एक ज्ञानेंद्रिय. तेजोमहाभूताच्या आधिक्याचे. त्याचे तेजद्रव्य, डोळा; शिर हे संश्रयस्थान; अधिष्ठान; रूप विषय; रूपज्ञान इंद्रिय बुद्धि. पित्ताच्या स्थानापैकी एक. ते दोन्ही डोळ्यात अधिष्ठित पण मुळात एकच.

**–( चक्षुः )–काम**–वि., **दृष्टिकामः** ( चसू. १३.४१ )
दृष्टि चांगली असावी अशा इच्छेचा.

**–प्रसादन**–न., **दृष्टिप्रसादनम्** ( सुचि. २४.७० )
दृष्टि स्वच्छ करणारे.

**–( चक्षुर् ) ग्रहण**–न., **लक्षण० दृष्ट्यवरोधः** ( सुक. ४.३९ )

नजरेला अडथळा, कमी दिसणे, सर्पदंशाने येणाऱ्या तिसऱ्या वेगाचे चिन्ह.

**–बुद्धि**–स्त्री., **चाक्षुष्यं चक्षुषा निर्वृत्तं ज्ञानम्** ( चसू. ८.१२ ) डोळ्याने झालेले ज्ञान.

**चक्षुरपसर्पण**–न , लक्षण० चक्षुर्व्यपगमः ( चनि. ७.६ ) डोळे जाणे, आंधळे होणे.

**चक्षुष्य**–वि., **चक्षुष्यम् चक्षुषे हितम्** ( चसू. २७.३०० ) डोळ्यांना हितकर.

**खनिज० अञ्जनम्** ( रा. १३.२१५ ) सुरमा.

**प्रपौण्डरीकम् वनस्पति०** ( ध. ३.९२ ) सालवणीच्या पानासारख्या पानांचे लहान क्षुद्रप. पुंडरीक.

**शिग्रुभेदः नीलशिग्रुः** ( रा. ७.६२ ) द्र० '**शिग्रु**' शेवग्याचा प्रकार. पहा 'शिग्रु'

**( चक्षुष्या )**–स्त्री., **खनिज० अञ्जनम्** ( ध. ३.१५६ ) **गुणाः–कषाया कटुः शीता चक्षुर्हिता विषनेत्रस्राव-विस्फोटकण्डूव्रणदोषघ्नी** ( ध. ३.१५६ )

सुरमा. **गुण**–तुरट, तिखट, थंड, डोळ्यांना हितकर, विषघ्न, जळाल्याच्या फोडासारखे फोड, व्रण, डोळ्याची गळ, खाज नाशक.

**वनस्पति० मेषशृङ्गी** ( रा. ९.११३ ) मेढशिंगी.

**कुलत्था** ( रापरि. ५.१८ ) कुळीथ.

**वनकुलत्थिका** ( चचि. २६.२५० ) **अस्या एकस्या अपि स्तन्यसंयुक्तायाः कल्पो नेत्ररोगे प्रशस्तः** ( काकल्प० षट्कल्पाध्यायः )

रानकुळीथ. हे एकटे अंगावरच्या दुधाबरोबर डोळ्याच्या रोगात प्रशस्त.

**चक्षूरोधन**–न., **नेत्रयोः क्रियाप्रतिबन्धः** ( अहसू. ७.२३ )

डोळ्यांची क्रिया न होणे, डोळ्यांच्या क्रियांना अडथळा.

**चङ्क्रमण**–न., **परिभ्रमणम्** ( सुचि. ३९.३४ ) **कुटिलगत्या परिभ्रमणम्** ( सुचि. २४.८० ) **गुणाः–अग्निबलायुर्वर्धनं मारुतस्यानुलोमनं खुडस्तम्भश्रमहननं च** ( असंसू. १२ ) **तदेवोपानद्रहितमनारोग्यं मनायुष्यमचक्षुष्यम्** ( सुचि. २४.७३ )

चालणे, फिरणे. वेडेवाकडे फिरणे.

**गुण**–अग्नि, बळ, आयुष्य वाढविते. वाताचे अनुलोमन–आपल्या मार्गाने गमन. श्रमनाश वातरक्त नाश करते तेच अनवाणी झाल्यास आरोग्य व आयुष्य यांचा नाश करते आणि डोळ्यांना घातक होते.

**चञ्चु**–स्त्री., वनस्पति० **गुणाः–मधुरा कषाया मलशोषणी तीक्ष्णा गुल्मोदरविबन्धार्शोग्रहणीरोगघ्नी च** ( रापरि. ४.१८ )

हिं.—चंचु, चेवुना, चेवुका.
म.—**चंचू.**
गु.—छुछ.
बं.—चेचको.

चंचू. लाल एरंड. मल बांधणारी, चांगली भाजी. ती गोड, तुरट, तीक्ष्ण, गुल्म, उदर, मलावरोध, मूळव्याध, ग्रहणीरोग नाशक आहे.

**शाक० प्रवाहिकायां बहुस्नेहेन युक्तोपयोज्या** ( चचि. १९.३२ )

एक चांगली भाजी, तूप किंवा तेल अधिक घालून उपयोगात आणावी.

**एरण्डभेदः रक्तैरण्डः** ( रा. ८.४४६ ) तांबडा एरंड. पहा 'एरण्ड'.

**–पत्र**–पु., वनस्पति० **चञ्चुशाकः** ( रापरि. ४.१८ ) चंचूचे पान.

**–बीजक**–न., **चञ्चुशाकबीजम्** ( र. २०.२–४ ) चंचूच्या भाजीचे बी.

**रक्तैरण्डबीजम्** ( र २०.२–४ ) तांबड्या एरंडाचे बी.

**–मालिका**–स्त्री., **दंशस्योपरि पिडकासदृशैराचितानि क्षतानि पदानि वा** ( ड सुक. ४.१५.१६ ) दंशाच्या वर मुळ्यासारखी विखुरलेली क्षते, भोके, खुणा.

**सर्पदष्टस्थानस्य पार्श्वे वटप्ररोहाग्रतुल्यो विषोत्पन्नोऽङ्कुरः ( गयी )** ( सुक. ४.१५.१६ )

सर्प चावला असता त्या जखमेभोवती वडाच्या पारंबीच्या टोकासारखा विषाने उत्पन्न झालेला अंकुर.

**चञ्चुक**–पु., वनस्पति० **रक्तैरण्डः** ( ध. १.२९६ ) लाल एरंड.

**चञ्चुर**–पु., वनस्पति० **चञ्चुः** ( रापरि. १.१८ ) चंचु.

**चटक**–पु., प्रतुदपक्षि० ( चसू. २७.५२ ) **मांस-गुणाः—मधुरं स्निग्धं बलशुक्रवर्धनं मारुतनाशनं संनिपातप्रशमनं च** ( चसू. २७.७५ ) **शीतं लघु कफघ्नम्** ( ध. ६.५० ) **तदण्डं क्षीणरेतःकास-हृद्रोगक्षतेपु हितं मधुरमविदाहि बलकरं च** ( चसू. २७.८६ ) **रक्तष्ठीवी चटकाण्डरसं पिबेत्** ( चचि. ११.२५–२६ ) **तद्वसा तु अहिततमा** ( चसू. २५.३९ )

चिमणी. टोचून टोचून भक्ष्य खाणारा पक्षी. **मांसगुण**–स्निग्ध, थंड, हलके, गोड, जळजळ न करणारे, बल शुक्र वाढविणारे, कफघ्न, संनिपात-नाशक. **अंडे**–शुक्रक्षीणता, हृद्रोग, खोकला व जखम यांना हिताचे; बलवर्धक. रक्ताची थुंकी येणारास याचा रस द्यावा. **वसा**–अतिशय अहितकर.

**( चटकी )**–स्त्री., **वनस्पति० गुञ्जा** ( ध. ४.२९ ) गुंज.

**चटचटायन**–न., **वातिकव्रणे वेदनाविशेषः** ( सुचि. १.७ )

चटचटणे. तडकणे, एकप्रकारची वेदना.

**चटित**–न., **वेदना** ( चनि. १.२१ )

चटचटणे, तडकणे, एकप्रकारची वेदना.

**चण**–पु., **वनस्पति० चणकः** ( रा. १६.१५६ )

चणा, हरभरा.

**–द्रुम**–पु., **वनस्पति० क्षुद्रगोक्षुरः** ( रा. ३.१३१ )

लहान गोखरू.

**-पत्री**–स्त्री., **वनस्पति० रुदन्ती** ( रापरि० ५.१५ )

रुद्रवन्ती, रुदन्ती, रानहरभरा.

**चणक**–पु,,–**धान्य०** ( चसू. २७.२८ ) **गुणाः–मधुरः शीतो रूक्षो वातलः पुंस्त्वघ्नो दीप्तिकरो वर्ण्यो बल्यो रुच्य आध्मानकरः कफपित्तघ्नो रक्तविकार-मेहनाशनश्च** ( ध. ६.१०१ )

हिं.—चना, चने, छोला.

**म.—हरभरा.**

गु.—चणा.

बं.—छोलारगाछकट.

फा.—नखूद.

चणा हरभरा–धान्य. गोड थंड रूक्ष वातल पुरुषत्व-नाशक अग्निदीपक वर्ण बल यांना चांगला रुचकर कफपित्तनाशक पोटफुगी करणारा रक्तविकार व प्रमेहनाशक.

**( चणका )**–स्त्री., **वनस्पति० मसूरिका** ( ध. ६.९५ )

मसूर.

**( चणिका )**–स्त्री., **वनस्पति० गुणाः—अतिमधुरा वृष्या बल्या बीजतृणसहिता च** ( रापरि. ८.६५ )

अतिशय गोड. दुधाळ गवत, हिचे गवत व बी पशूंना हितकर. शुक्र बल वर्धक.

**–क्षारोदक**–न., **चणकपञ्चाङ्गात् क्षारपातविधिना पातितस्य क्षारस्य जलेन मिश्रणम्** ( र. १६.१४०–१४५ )

हरभऱ्याचे पंचांग जाळून यथाविधि क्षार काढलेले पाणी.

**–प्रयोग**–पु., **संस्कार० रात्रौ कान्तलोहपात्रे जले स्थापितान् चणकान् सुक्लिन्नान् मुष्टिमितान् भक्षयेत् । मर्यादा—षण्मासाः । फलं—नैकव्याधि-विनाशः कुष्ठप्रमेहपाण्डुयक्ष्मकामलानिर्मूलनञ्च । पथ्यं तक्रम्** ( र. २६.३९ )

रात्री कांतलोहपात्रात, पाण्यात चणे भिजत घालून सकाळी एक मूठभर खावेत सहा महिने. **गुण**–अनेक व्याधींचा नाश. कुष्ठ प्रमेह पाण्डु क्षयरोग कावीळ नाशक, **पथ्य**-ताक.

**चणकाम्ल**–न., **चणकशाकोद्भवो द्रवः** ( र. १०.८० )

**अत्यम्लं दन्तहर्षणं लवणानुरसं रुच्यं शूलाजीर्ण-विबन्धनुत्** ( वैशसिं. )

रात्री चण्याच्या झाडावर पडलेली एकत्र केलेली दंव. ही अतिशय आंबट, दाताला शहारे आणणारी मागाहून थोडी खारट, चवदार, शूल अजीर्ण व मलबद्धता नाशक.

**चण्ड**-वि., **शीघ्रकोपः, आसुरसत्त्वलक्षणम्** ( सुशा. ४.८८ )

भयंकर, शीघ्रकोप, आसुर प्रकृतीचे लक्षण.

न., **आसुत० सूक्तम्** ( ध. ६.२४६ ) शिरका.

**( चण्डा )**–स्त्री., **वनस्पति० चोरकः** ( ध. ३.७१ )

चोरओवा.

**कपिकच्छूः** ( ध. १.१५१ ) खाजकुहिली.

**आखुकर्णी** ( रापरि. ३.२२ ) उंदीरकानी.

**लिङ्गिनी** ( रापरि. ३.१७ ) शिवलिंगी.

**द्रवन्ती** ( ध. १.२२९ ) रुद्रवंती, हरभरा.

**दन्ती** ( चक. १२.३ ) दांती.

**चोरहुली, श्वासहरगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१६ )

श्वासहर गणातले एक द्रव्य.

**अजमोदाकारं सुगन्धिद्रव्यम्** ( सुसू. ४२.११ )

ओव्यासारखे सुगंधी द्रव्य.

**दूर्वाभेदः** ( रा. ८.२२९ ) द्र० ' **दूर्वा** '

पांढरी दूर्वा.

**कोपना** ( अरु. अहसू. १५.४३ ) एक द्रव्य.

**–संग्रहगदैककपाट**–पु., **रसयोग० ज्वरगुल्मार्शो-ऽतिसारनाशनः** ( र. १६.५१–६१ )

पाऱ्याचा एक योग; ताप गुल्म मूळव्याध अतिसार नाशक.

**–हासा**–स्त्री., **वनस्पति० गुडूची** ( रा. ३.२ )

गुळवेल.

**चण्डक**–पु., वनस्पति० करवीरः ( ध. ४.२ ) कण्हेर.

**( चण्डिका )**–स्त्री., रेवतीग्रह० त्रयोदशे दिनेऽपत्यं विनाशयति ( कारेवतीक. ४६ )
एक बालग्रह. ती तेराव्या दिवशी मुलाला मारते.

**चण्डातक**–पु., वनस्पति० करवीरः ( ध. ४.२ ) कण्हेर.

**चण्डाल**–पु., चाण्डालः ( असंशा. १२.१८ ) चांडाळ.

**( चण्डाली )**–स्त्री., वनस्पति० लिङ्गिनी (रापरि. ३.१७) शिवलिंगी.

**–कन्द**–पु., वनस्पति० गुणाः—मधुरो रसायनः कफपित्तघ्नः कफपित्तास्रदोषविषभूतादिदोषघ्नः ( रापरि. ७.४८ )
चंडाळकंद. पाच प्रकार असलेला. एक पानी, दोन पानी, तीन पानी, चार पानी, पांच पानी. **गुण**–गोड, कफपित्तनाशक, रसायन, कफपित्तरक्तदोष-नाशक, विष, भूतबाधानाशक.

**चतुर्**–वि., संख्याविशेषः ( सुशा. १०.२२ ) चार.

**–गुण**–न., चतुःप्रमाणम्; चतुरावृत्तिकम् ( चक. १२.१०१ )
चारपट.

**–जात**–न., त्वगेलापत्रकेशरम् ( सुशा. १०.२२ ) त्वक्पत्रैलं त्रिजातकं, तदेव सकेसरं चतुर्जातम् ( अहसू. ६.१६० )
दालचिनी, वेलदोडा, तमालपत्र नागकेशर मिळून.

**–भद्र**–पु., बस्तिकल्पोऽयं ( काखिल. ८.२२–२३ )
आस्थापन वस्तीच्या अगोदर चार स्नेहवस्ति ( प्रथम ) व शेवटी चार स्नेहवस्ति देण्याचा विधि.

**–विध**–वि., चतुःप्रकारकम् ( सुउ. २२.९ )
चार प्रकारचा.

**–विंशतिक**–पु., पुरुष० चतुर्विंशतितत्त्वयुक्तः पुरुषः प्रकृतिर्महानहंकारः एकादशेन्द्रियाणि पञ्चतन्मात्राणि पंचभूतानि चेति चतुर्विंशतितत्त्वानि । अत्र प्रकृतिव्यतिरिक्तं चोदासीनं पुरुषमव्यक्तसाधर्म्याद्व्यक्तायां प्रकृतौ एव प्रक्षिप्य अव्यक्तशब्देनैव गृह्णाति तेन चतुर्विंशतिकः पुरुष इति अविरुद्धम् ( चक्रः चशा. १.१७ )
पुरुष. चोवीस तत्वयुक्त. अव्यक्त (प्रकृति+पुरुष), महत अहंकार मन पांच ज्ञानेंद्रिये पाच कर्मेंद्रिये ( अकरा इंद्रिये ) पाच तन्मात्रा पाच भूते अशा चोवीस तत्वांचा पुरुष.

**–हस्त**–वि., हस्तचतुष्टयसम्मितम् ( सुसू. २.४ )
चार हाताचा–चार हात लांबीचा.



**चतुरङ्गुल**–पु., वनस्पति० आरग्वधः ( ध. १.२१९ )
बहावा.

**चतुरम्ल**–न., अम्लचतुष्टयम्, चतुरम्लं हृद्यवर्गे प्रथमोक्तं वृक्षाम्लाम्लवेतसदाडिमबदररूपम् ( चचि. १५.१११ )
आंबट चौकडी. चार अम्ले, हृदयाला हितकर. १ अमसूल २ अम्लवेतस ३ डाळिंब (आंबट) ४ बोर.

**चतुरस्र**–वि., चतुष्कोणम् ( सुसू. २२.५ )
चार कोनांचा, चौकोनी.

**चतुःश्रेयस्**–वि., चत्वारि देहाग्निबलचेतःसम्बन्धीनि श्रेयांस्यस्येति चतुःश्रेयः ( चिकित्सितम् ) ( चनि. ८.३७ )
चार श्रेये. श्रेयांची चौकडी. देह अग्नि बळ व मन ही चांगली करण्याचे श्रेय घेणारी चिकित्सा.

**( चतुः– ) सुधारस** पु., भैषज्य० ताम्रसुवर्णरौप्ययुक्तः जीर्णशूलगुल्महरः ( र. २१.१०४–११५ )
तांबे, सोने, चांदी आणि सुवर्णमाक्षिक युक्त योग; जुनाट शूलविकार आणि गुल्मनाशक.

**–स्नेह**–न., घृततैलवसामज्जानश्चत्वारः स्नेहाः ( सुसू. ४४.४७–४९ )
चार स्नेह. तूप तेल वसा मज्जा.

**( चतुष्– )–पत्री**–स्त्री., वनस्पति० पाषाणभेदप्रकारः ( रा. ५.२१५ )
पाषाणभेदाचा एक प्रकार.

**–पथ**–पु., मार्गचतुष्टयसंयोगः ( सुचि. २४.८९ )
चौवाटा, चव्हाटा, चौक.

**–पद**–पु., वनस्पति० भेण्डा ( रापरि. ४.२५ )
पाने हाताच्या बोटासारखी विभागलेली, आंबट, बी वाटोळे, असलेली वनस्पती.

**–पद्दंश**–पु., रोग० लक्षणम्–मुहुर्मुहुः शिरोन्यासः शोथः स्रस्तौष्ठकर्णता ज्वरः स्तब्धाक्षिगात्रत्वं हनुकम्पोऽङ्गमर्दनं रोमापगमनं ग्लानिररतिर्वेपथुर्भ्रमश्च ( चचि. २३.२२९.२३० )
सर्पदंशाच्या चार खुणा दिसणारा. **लक्षण**–वारंवार डोके हालवणे, सूज, कान ओठ आपल्या नेहमीच्या ठिकाणापासून ढळलेले, ताप डोळे व अंग ताठरलेले हातपाय तसेच हनुवटी कापणे अंग ठणकणे केस गळणे अंग गळाल्यासारखे वाटणे, बेचैनी, कंप व भ्रम.

**–पदाभिगमन**–न., पश्वादिभिर्गमनं मैथुनमिति यावत् ( चचि. ३०.१६६–१६८ )
चतुष्पाद पशूशी मैथुन, संभोग.

**-पदीगमन**-न., अजादिभिश्चतुरंघ्रिभिः सह मैथुनक्रिया ( सुनि. १२.७ )
शेळी इत्यादि पशुस्त्रीशी संभोग करणे.

**-पर्णी**-स्त्री., वनस्पति० क्षुद्राम्लिका ( ध. ५.३६ )
अंबुटी, अम्ललोणिका, भुईसर्पटी.

**-पादकीट**-पु., चतुष्पादकीटप्रतिसूर्यकादिः ( ड. सुक. ८.२८ )
चार पायांचा किडा.

**-पादक्षत**-न., हस्त्यश्वप्रभृतिपशुभिः कृतं क्षतं, तेन रागज्वरस्रावरुजो भवन्ति, शूयते पच्यते च ( असंउ. ४६ )
हत्ती घोडा इ० प्राण्यांनी केलेली जखम; त्यामुळे लाली, ताप, स्राव, वेदना सूज होतात. सूज पिकते.

**-पुण्ड्र**-पु., वनस्पति० भेण्डा ( रापरि. ४.२५ )
हाताच्या बोटांसारखी आंवट पाने वाटोळे बी असलेली भाजी.

**-प्रयोग**-पु., पाननस्याभ्यङ्गानुवासनानि ( असंउ. ३२ )
पिणे, नाकात घालणे, अंगाला लावणे, गुदद्वाराने बस्ति घेणे हे चार प्रयोग.

**-फला**-स्त्री., वनस्पति० नागबला ( रा.४.४२७ )
नागबला, चिकणा.

**चतुर्थ**-वि., तुरीयः ( सुचि. ९.९ ) चवथा.

**-कर्मगुणप्राप्त**-वि., त्वग्धातोश्चतुर्थं मेदः तस्य कर्माणि शोधनादीनि, तेषां तु गुणाः फलं, तेन मेदोगतं संशोधनादिगुणविशिष्टमित्यर्थः। अथवा चतुर्थे मेदसि स्थितं चतुर्थम्, तस्य कर्माणि गुणाश्च दौर्गन्ध्योपदेहपूयादयस्तैः प्राप्तं युक्तं कुष्ठादि ( सुचि. ९.६ )
चवथा धातू मेद. त्याचे शोधन शमन ही कर्मे केल्यास त्यांचे गुण—अनुकूल परिणाम लाभलेले किंवा मेदोधातूत असलेल्या दोषांच्या दुष्टीचे परिणाम दुर्गंधी मळ व पू इ. होऊन कुष्ठ वगैरे होणे.

**-भक्त**-वि., एकाहमुपोष्य द्वितीयेऽहनि सायंभोजनम् उपसेवमानः ( सुचि. ९.१९ )
सबंध एक दिवस उपवास करून दुसऱ्या दिवशी सायंकाळी भोजन करणे, तीन जेवणे सोडून चवथे जेवण घेणारा.

**-भक्तान्तरित**-वि., पक्षादूर्ध्वं प्रथमेऽहनि सायंप्रातर्भोजनद्वयं निषेव्य द्वितीयदिने प्रातर्भुक्तवतो यदा चतुर्थं भुक्तं भोजनमन्तरितं वर्जितं तदा स एवमुच्यते। चतुर्थं भोजनं वर्जितं यस्य सः ( सुचि. १३.२४-२५ )
शुद्धीच्या १५ दि. नंतर तीन भोजनानंतर चवथे भोजन न घेणारा.

**चतुर्थक**-पु., रोग० चतुर्थे दिने भवति इति चतुर्थकः विषमज्वरभेदः
( चशा. १.११३ चचि. ३.७२ सुउ. ३९.७०-७१ )
दोन दिवस सोडून चवथ्या दिवशी येणारा ज्वर. विषमज्वराचा प्रकार. चौधारे.
अस्थिमज्जगो दोषश्चतुर्थकज्वरं कुरुते। चतुर्थके चतुर्थदिनभावित्वमस्ति। चतुर्थको द्विविधं प्रभावं दर्शयति। तत्र श्लैष्मिकः पूर्वं जङ्घाभ्यामनिलसंभवश्च पूर्वं शिरस्तः संभवति। तदनन्तरं निखिलदेहं व्याप्नोति। चतुर्थकविपर्ययस्तु मध्ये दिनद्वयं भूत्वा आदावन्ते च मुञ्चति
बहुधा अस्थिमज्जागत दोष चौधारे करतात. चतुर्थक ज्वरात चवथ्या दिवशी येणे हे निश्चित असते. हा ज्वर दोन प्रकारची स्थिति दर्शवितो. त्यात जो कफप्रधान असेल त्याचा आरंभ पिंड्यापासून होतो आणि ज्यामध्ये वाताचे प्राधान्य असेल त्याचा आरंभ डोक्याकडून होतो व नंतरच सर्व देहभर पसरतो. असा हा ज्वर जेव्हा दोन दिवस राहतो व त्या पूर्वीचा आणि नंतरचा एक एक दिवस नसतो. अशा स्थितीला चतुर्थकविपर्यय म्हणतात.

**( चतुर्थिका )**-स्त्री., मान० पलम् ( चक. १२.९२ ) ( असंक. ८ )
चार तोळे. वजन.

**-विपर्यय**-पु., रोग० चतुर्थकज्वरः; एष दिनद्वयं मध्ये भूत्वा आदौ अन्ते च मुञ्चति ( चचि. ३.७३ ) ( सुउ. ३९.५५ )
दोन दिवस ज्वर ( अगोदरचा व नंतरचा दिवस ) नसणे. एक प्रकारचे चौधारे. चौधाऱ्याचा विपर्यय.

**चत्वर**-न., चतुष्पथः; चत्यते स्वीक्रियते बल्यादि अस्मिन् इति चत्वरम् ( सुउ. ६०.३३ )
चव्हाटा. चारवाटा येऊन मिळणारी जागा.
अङ्गणम् ( सुउ. ६०.३३ ) चौक, अंगण.

**चन्दन**-पु., न., वनस्पति० सुगन्धिद्रव्यम् ( चसू. ४.१० )
गुणाः—स्वादुस्तिक्तः कषायः कटुः शीतो गुरू रूक्षो रक्तप्रसादनो वृष्यो दाहहरो रक्तपित्तविषतृड्दाहकृमिघ्नश्च ( ध. ३.१ ) तत्सप्तविधं श्रीखण्डशबरपीतपतङ्गरक्तचन्दनबर्बरहरिगन्धभेदेन ( भाप्र. ) दुर्गन्ध-

हृदाहनिर्वापणलेपनानां श्रेष्ठम् ( चसू. २५.४० ) महाकषायवर्गे कण्डूघ्नगणे एकं द्रव्यम् ( चसू. ४.११ )

वर्ण्यगणे एकं द्रव्यम् ( चसू. ४.१० ) अङ्गमर्द-प्रशमनगणे ( चसू. ४.१७ ) धूम्रपाने उपयुज्यते ( चसू. ५.२१ )

अञ्जनार्थमुपयुक्तम् ( सुउ. १७.२७ ) रक्तातीसारे उपयुक्तम् ( चचि. १९.८६ ) शुक्रमेहे समुपयोज्यम् (सुचि. ११.९) कुणपपूयार्तवे समुपयुज्यते ( असंशा. १.३८ )

हिं.—संदल.
म.—**चंदन.**
बं.—चन्दन.
गु.—सुखड.
फा.—सन्दलु, सफेद.

चंदन सुगंधी वनस्पती. **गुण**—गोड, तिखट, तुरट, कडु, थंड, जड, रूक्ष, रक्त शुद्ध करणारे शुक्रधातूला, चांगले, दाह, रक्तपित्त, विष, तहान, कृमि, शुक्रमेह, रक्तातीसार, दुर्गंधी व पूययुक्त आर्तवाचे नाशक. **प्रकार सात**—वर आहेत. दुर्गंधहर व दाहनाशक लेपात श्रेष्ठ. कण्डूघ्न, वर्ण चांगला करणारी; अंग दुखणे कमी करणाऱ्या द्रव्याच्या गणातील एक. धूम्रपान व अंजन याकरिता उपयोगी.

**वनस्पति० मधुकसारः** ( सुउ. २६.३४ )
ज्येष्ठमध.

**( चन्दना )**—स्त्री., **वनस्पति० सारिवा** ( ध.१.१६२ )
अनंतमूळ.

**—गोपा**—स्त्री., **वनस्पति० सारिवा** ( ध. १.१६२ )
अनंतमूळ.

**—पुष्प**—न., **वनस्पति० लवङ्गम्** ( ध. ३.४१ ) लवंग.

**—पुष्पक**—न., **वनस्पति० लवङ्गम्** (ध. ३.४१) लवंग.

**—रूषित**—वि., **चन्दनलिप्तम्** ( असंसू. ४ )
चंदन लावलेला, चंदनाचा लेप केलेला.

**—सार**—न., **क्षार० वज्रकक्षारः** (रा. ६.५५) एक मीठ.

**—सारिवा**—स्त्री., **वनस्पति० सारिवा०** (ध. १.१६२)
अनंतमूळ.

**चन्दनाञ्जन**—न.,—**अञ्जन० षड्विधतिमिररोगापहमिदम्** ( र. २३.५६.५७ )

चंदनाचे अंजन, तिमिररोगनाशक.

**चन्दनादिवर्ति**—स्त्री., **लेखनवर्तिः, नेत्ररोगेषूपयुज्यते** ( सुउ. ( १२.१३.१४ )

चंदन इत्यादी असलेली वात, कांडी. ही उगाळून डोळ्याच्या रोगात योजतात.

**चन्दनाद्यतैल**—न., **शीतवीर्यं तैलं, दाहज्वरप्रशमनम्** ( चचि. ३.२५८ )

चंदन इत्यादी द्रव्यांनी तयार केलेले तेल. थंड, दाह व ज्वरनाशक.

**चन्दनोदुम्बरयोग**—पु., **योग० अभिष्यन्दे उपयुज्यते, चन्दनोदुम्बरे क्षीरपिष्टेऽञ्जनं पित्ताभिष्यन्दे उपयुक्तम्; चन्दनोदुम्बरं भृशतरं चूर्णितं बस्त्रबद्धं तोयप्लुतमाश्च्योतनाञ्जनम्** ( सुउ. १०.१० )
चंदन व उंबर यांचा योग. चंदन व उंबर दुधात उगाळून पित्ताने डोळे आल्यास अंजन करावे. यांचे चूर्ण कपड्यात बांधून पाण्यात बुडवून डोळ्यावर शिंपडण्याला व अंजन करण्याला उपयुक्त.

**चन्द्र**—पु., **देवता०, सोमः** ( अहसू. १८.१६ )
चंद्र, चांदोबा.
**वनस्पति० कर्पूरः** ( ध. ३.३१ ) कापूर.
**खनिज० सुवर्णम्** ( रा. १३.३ ) सोने.

**—कला**—स्त्री., **तोलमानं सूतं ताम्रं च त्रिदिनं मर्दयित्वा गुटिकां कुर्यादग्नौ शोषयित्वा पुनः संमर्दयेत् । ततो द्वितोलेन गन्धकेन कज्जलिकां कृत्वा मुस्तादाडिमदूर्वाकेतकीसहदेवीकुमारीपर्पटरामशीतलिकाशतावरीणां रसैर्भावयेत् । ततो गुडूचीसत्त्वं पर्पटोशीरपिप्पलीशृङ्गाटसारिवाणां च समानं चूर्णं प्रक्षिप्य द्राक्षादिकषायेण सप्तकृत्वः भावयेत् । अनन्तरं वस्त्रेऽवगुण्ठ्य परिपीड्य गुटिकां कुर्यात् । अयं सर्वपित्तविकारनाशनो योगः । विशेषतो दाहनाशनो रक्तपित्तप्रदरमूत्रकृच्छ्रनाशनश्च** ( र. १४.१३.२२ )

एक तोळा पारा व एक तोळा ताम्रभस्म तीन दिवस एकत्र खलून अग्नीवर सुकवावी—दोन तोळे गंधक घालून कज्जली करावी—नागरमोथा, डाळिंब, दूर्वा, केवडा, मुद्रिका ( बला ) कोरफड, पित्तपापडा, रामशीतला, सीताफळ, शतावरी यांच्या रसांची भावना द्यावी. नंतर गुळवेल सत्त्व, पित्तपापडा, वाळा, पिंपळी, शिंगाडे, व उपळसरी यांचे समभाग चूर्ण घालून द्राक्षादि औषधांच्या काढ्याच्या सात भावना द्याव्या. व वस्त्रात गुंडाळून दाबून गोळी करावी. सर्व पित्तविकार नाशक; विशेषतः दाहना असा हा योग आहे. रक्तपित्त विकारातील रक्त स्त्रियांचा प्रदर आणि कष्टाने लघवी होण विकार नाशक आहे.

**–पादप**–पु., वनस्पति० कोशाम्रः ( ध. ५.९ )
रानआंबा.

**–प्रकाश**–वि., लाक्षाप्रकाशः, लाक्षासदृश इत्यर्थः ( सुचि., १३.४ )
लाखेसारखा.

**–मणि**–पु., क्षुद्ररोग० तत्स्वरूपम्, नीरुजं, सममुत्सन्नं, मण्डलमीषद्रक्तं, श्लक्ष्णं, सहजम् ( सुनि. १३.४१ )
चर्मकीलसदृशः सरुजः ( असंउ.३६.३१६ )
एनं समुत्कृत्य क्षारेण वह्निना वा प्रदहेत् ( सुचि. २०.३२–३३ )
अयं छेद्यः ( सुसू. २५.४–५ )
लहान रोग–थोडा लाल, चिकण, गोल, वेदना नसलेला, चामखिळासारखा, त्वचेच्या वर आलेला मोड. केव्हा वेदना असते. **उपचार**–शस्त्राने उकरून क्षार किंवा अग्नीने जाळावा.

**–मुख**–पु., धान्य० व्रीहिभेदः जतु लाक्षा, तदाकृति मुखं यस्यासौ जतुमुखः, व्रीहिविशेषः ( सुसू. ४६.१२ ड )
व्रीही तांदुळाचा प्रकार.

**–श्रुत**–वि., लाक्षालिप्तम् ( असंचि. १० )
लाख लावलेला–लाखोटा.

**जतुका**–स्त्री., वनस्पति० जन्तुका ( ध. ४.८८ )
माळव्यात जंतुकारी म्हणतात. पुष्कळ गांठी असलेल्या पानांची कुहिलीच्या शेंगेसारख्या मोठ्या व वाकड्या शेंगेची झाडावर चढणारी बारीक काळी वेल.
**प्राणि०, चर्मचटिका** ( चचि. १४.४८ )
एक प्राणी.

**जतूकर्ण**–पु., पुनर्वसोरात्रेयस्य शिष्यः, तन्त्रकर्तॄणामेकतमः ( चसू. १.३१ )
पुनर्वसु आत्रेयांचा शिष्य ग्रंथकर्ता.

**जतूमुख**–पु., धान्य० व्रीहिः ( अहसू. ६.८ )
व्रीहि जातीचा तांदूळ.

**जत्रु**–न., शारीर० स्कन्धकक्षासन्ध्यस्थि ( चशा. ७.६ )
खांदा, कांख संधीचे हाड.
**ग्रीवामूलम्** ( सुसू. ४६.४४० ) मानेचे मूळ.

**–मूल**–न., शारीर० कण्ठादधोविद्यमानो जत्रुद्वयमध्यभागः ( असंनि. ४.२१ )
गळ्याच्या खाली असलेला जत्रू जोडीच्या मधला भाग.

**–ढुण्डन**–न., लक्षण० ढुण्डनं शिरःप्रभृतीनामन्तः प्रवेशः; वक्षस उपरोधः ( चचि. २८.२२ )
जत्रु आत जाणे, छाती आत जाणे.

**जत्वश्मक–जत्वश्मज**–न., खनिज० शिलाजतु ( रा. १३.२२९ )
शिलाजतु.

**जन**–पु., लोकः ( चनि. ६.१३ )
लोक, जनता.

**( जन )–पद**–पु., जनवसतिस्थानम् ( चवि. ३.२० )
**मण्डलम्** ( चक्र. चनि. ६.१३ )
लोकांचे वसतिस्थान. गांव.

**–पदमण्डल**–न., जनपदानां समूहः ( चवि. ३.३ )
तालुका, जिल्हा, प्रांत, राष्ट्र.

**जनक**–पु., राजर्षि० वैदेहः ( चशा. ६.२१ )
जनक राजा.

**जननी**–स्त्री., माता ( कासू. लेहाध्याय ) आई.
**वनस्पति० मञ्जिष्ठा** ( रा. ६.१६ ) मंजिष्ठ.
**जन्तुका** ( ध. ४.८८ ) पहा 'जतुका'
**कटुका** ( ध. १.३८ ) कुटकी.
**जटामांसी** ( रा. १२.९१ ) जटामांसी.
**अलक्तकः** ( रा. ६.१२ ) अळिता.

**( जना )**–स्त्री., वनस्पति० कटुका ( ध. १.३८ )
कुटकी.

**–पदोद्ध्वंस**–पु., असामान्यवतामप्येभिः प्रकृत्यादिभिर्भावैर्मनुष्याणां येऽन्ये भावाः सामान्यास्तद्वैगुण्यात् समानकालाः समानलिङ्गाश्च व्याधयोऽभिनिर्वर्तमाना जनपदमुद्ध्वंसयन्ति । ते तु खल्विमे भावाः सामान्या जनपदेषु भवन्ति; तद्यथा–वायुरुदकं, देशः, काल इति । तत्र वातमेवंविधमनारोग्यकरं विद्यात्, तद्यथा–यथर्तुविषममतिस्तिमितमतिचलमतिपरुषमतिशीतमत्युष्णमतिरूक्षमत्यभिष्यन्दिनमतिभैरवारावमतिप्रतिहतपरस्परगतिमतिकुण्डलिनमसात्म्यगन्धबाष्पसिकतापांशुधूमोपहतमिति । उदकं तु खल्वत्यर्थविकृतगन्धवर्णरसस्पर्शं क्लेदबहुलमपक्रान्तजलचरविहङ्गमुपक्षीणजलाशयमप्रीतिकरमपगतगुणं विद्यात् । देशं पुनः प्रकृतिविकृतवर्णगन्धरसस्पर्शं क्लेदबहुलमुपसृष्टं सरीसृपव्यालमशकशलभमक्षिकामूषकोलूकश्माशानिकशकुनिजम्बूकादिभिस्तृणोलूपोपवनवन्तं प्रतानादिबहुलमपूर्ववदवपतितशुष्कनष्टशस्यं धूम्रपवनं प्रध्मातपतत्रिगणमुत्क्रुष्टश्वगणमुद्भ्रान्तव्यथितविविधमृगपक्षि-

सङ्कमुत्सृष्टनष्टधर्मसत्यलज्जाचारशीलगुणजनपदं शश्वत्क्षुभितोदीर्णसलिलाशयं प्रततोल्कापातनिर्घात-भूमिकम्पमतिभयारावरूपं रूक्षताम्रारुणसिताभ्र-जालसंवृतार्कचन्द्रतारकमभीक्ष्णं ससंभ्रमोद्वेगमिव सत्रासरुदितमिव सतमस्कमिव गुह्यकाचरितमिवा-क्रन्दितशब्दबहुलं चाहितं विद्यात् । कालं तु खलु यथर्तुलिङ्गाद्विपरीतलिङ्गमतिलिङ्गं हीनलिङ्गं चाहितं व्यवस्येत् ( चवि. ३.१३–७ ) स्वभावतो वाता-जलं, जलाद्देशं, देशात्कालं गरीयस्तरं विद्यात् । वाय्वादीनां यद्वैगुण्यमुत्पद्यते तस्य मूलमधर्मः, तन्मूलं वाऽसत्कर्म पूर्वकृतं, तयोर्योनिः प्रज्ञापराध एव । तथा शस्त्रप्रभवस्यापि जनपदोद्ध्वंसस्याधर्म एव हेतुर्भवति । तस्य प्रतिकारोपायाः पञ्च कर्माणि, विधिवद्रसायनोपयोगः, भेषजैर्देहवृत्तिः, सत्यं, दया, दानं, बलयः, देवतार्चनं, सद्वृत्तानुवर्तनं, शान्तिः, आत्मरक्षणं, शिवानां जनपदानां सेवनं, ब्रह्मचर्यं, ब्रह्मचारिणां च सेवनं, धर्मशास्त्रादिश्रवणं, सात्विकैः धार्मिकैः सह संवादः ( चवि. ३.१३–१७ )

गांवे शहरे प्रांत इ० उध्वस्त होणे. कारण साथीचे रोग. मनुष्याचे प्रकृतिबल इत्यादी असमानभाव आहेत. यांखेरीज सर्व लोकांचे जे सामान्य भाव आहेत त्यांचे वैगुण्य झाले ते बिघडले की त्यांचा अनिष्ट परिणाम सर्व लोकांवर एकदम होतो व एकावेळीच सारख्या चिन्हांचे व्याधी निर्माण होतात. एकच रोग सर्वांना होतो, त्या रोगाची साथ येते, व एकदम अनेक लोक आजारी पडतात, मरतात. हे सामान्य भाव चार. हवा पाणी देश व काल. १ **हवा**–एकदम अति थंड अति उष्ण अति रूक्ष इ० अनेक प्रकारांनी दुष्ट होते. २ **पाणी**–अतिशय बिघडणे, त्याची चव रस वास स्पर्श इ० बिघडणे ही जलदुष्टि. ३ **देश**–विकृत गंध रस स्पर्शाची, जमीन होऊन तिच्यात दलदल खूप झाली सरपटणारे प्राणी माशा डास उंदीर घुबड कोल्हे इत्यादी प्राणी खूप झाले ते रडू लागले दुष्काळ पडला फार उल्का पडू लागल्या तर व भूकंप इत्यादी अनेक कारणांनी देश दुष्ट होतो. ४ **काल** त्याच्या नित्याच्या स्वरूपाहून भिन्न विपरीत अति किंवा हीनगुणांचा होतो. वातापेक्षां जल त्यापेक्षा देश व देशापेक्षा काल हा प्रतिकाराला किंवा अनुकूल करण्याला कठीण आहे. ही सर्व बिघडण्याचे कारण मानवाचा प्रज्ञापराध हे आहे. आपल्या सदसद्विवेक बुद्धीच्या विरुद्ध आहारादी आचार व्यवहार करतो. हे होय.

**–पदोद्ध्वंसकर**–वि., **जनपदानामुद्ध्वंसं करोति इति जनपदोद्ध्वंसकरः जनपदानामुद्ध्वंसो येन भवति तत्** ( चवि. ३.७ )

° गांवेच्या गांवे उद्ध्वस्त करणारा. युद्धे ही साथीला कारण आहेत. **उपचार**–साथ येणार असे दिसताच योग्य त्या वामक रेचक इत्यादींनी शरीर शुद्ध ( दोषरहित ) करावे. सर्व धातूंचे परिपोषण बल प्रतिकार सामर्थ्य इ० वाढवणारी रसायन आहार औषधे घ्यावीत, आक्रमक रोगाच्या नाशक औषधांचे सेवन करावे. सत्याचरण दया दान देवतार्चन इत्यादी मानसिक उपचार करावे. गांव सोडून चांगल्या भागात रहाण्यास जावे.

**–पदोद्ध्वंसन**–न., **जनपदोद्ध्वंसः** ( चवि. ३.५ )
गावांचा उद्ध्वंस, नाश.

**–पदोद्ध्वंसनीय**–वि., **अध्याय०** ( चवि. ३.१ )
अध्यायाचे नांव.

**–प्रिय**–पु., **वनस्पति० नीलशिग्रुः** ( रा. ७.६२ )
**द्रष्टव्यं ' शिग्रुः '**
शेवगा. पहा ' शिग्रु.
**धान्यकम्** ( रा. ६.९८ ) धणे.

**–वल्लभ**–पु., **वनस्पति० रोहितकभेदः, श्वेतरोहितः** ( रा. ८.२१८ ) **द्रष्टव्यं ' रोहितक; '**
रोहड्याचा प्रकार. पांढरा रोहडा. पहा 'रोहितक'

**जनेष्ट**–पु., **वनस्पति० मुद्गरः** ( रा. १०.२२ )
सात पानांची गोल फुलांची अती सुगंधी वनस्पती.

**( जनेष्टा )**–स्त्री., **वनस्पति० जन्तुका** ( रा. ३.१२८ )
पहा ' जतुका '.
**ऋद्धिः** ( रा. ५.१८८ )
जीवन चालविण्यास समर्थ अशा वनस्पतींपैकी. अष्टवर्गातील वनस्पती.
**जाती** ( रा. १०.२३२ ) मालती, जाई.

**जनिष्ठा**–स्त्री., **वनस्पति० हरिद्रा** ( रा. ६.७९ ) हळद.

**जन्ती**–स्त्री., **जयन्ती, कृमिपर्यायः** ( र. २०.२२२ )
एक कृमि.

**जन्तीनु**–स्त्री., **वनस्पति० काकोदुम्बरिका** ( र. २०.२२२ )
काळा उंबर, खरोती.

**जन्तु**–पु., **नरः** ( चचि. ३.२०७ )
नर, मनुष्य, प्राणी.

कीट० ( चचि. ७.३६ ) किडा.

कृमिः ( सुसू. ४६.२४५ ) कृमि, किडा.

रोगोत्पादकः कृमिः ( र. ५.१९३ )
रोग उत्पन्न करणारा किडा.

यूका ( सुचि. २४.२९ ) ऊ.

**–कम्बु**–पु., भैषज्य० कृमिशङ्खः ( रा. १३.२४७ )
शंखकिडा.

**–कारी**–स्त्री., वनस्पति० जन्तुका ( ध. ४.८८ )
पहा 'जतुका'.

अलक्तकः ( रा. ६.१२ ) अळिता.

**–कार्दित**–वि., ( क्षुद्र ) जन्तुदष्टः, जन्तुदष्टबालस्य लक्षणानि–स्वस्थोऽपि बालो निशि न शेते, रक्त-बिन्दुचिताङ्गश्च भवति ( कासू. २५.३९ )
जंतु चावलेला. लक्षण० निरोगी बालकही रात्री झोपत नाही व अंगावर लाल ठिपके.

**–कृष्णा**–स्त्री., वनस्पति० जन्तुका ( ध. ४.८८ )
पहा 'जतुका'.

**–घ्न**–पु., वनस्पति० मातुलुङ्गः ( रा. ११.२७ )
महाळुंग.

हिङ्गु ( ध. २.३६ ) हिंग.

विडङ्गम् ( र. ५.२०२ ) वावडिंग.

**( –घ्नी )**–स्त्री., विडङ्गम् ( रा. ६.१५ )
वावडिंग.

**–घ्नी वटी**–स्त्री., पारदयोग० पारदगन्धकमण्डूराखु-कर्ण्यादिभिः सिद्धो भल्लातकपलाशबीजादियुक्तोऽयं योगः कृमिकुष्ठनाशकः ( र. २०.१३०.३६ )
पाऱ्याचा कल्प. पारा गंधक मंडूर तसेच उंदीरकानी इ० नी सिद्ध केलेला भिलावा व पळसपापडी इ० औषधयुक्त असा कृमिहरयोग.

**–जग्ध**–वि., जन्तुभिर्भक्षितम् ( अहसू. ५.४४ )
जंतूंनी खाल्लेले.

**–जित्**–पु., वनस्पति० जम्बीरः ( रा. ११.१८ )
ईडनिंबू. निंबू.

**–जुष्ट**–वि., जन्तुयुक्तम् ( अहसू. ६.१४१ )
जंतुयुक्त.

**–दुष्ट**–वि., कृमिदुष्टम् ( असंसू. ४०.५ )
जंतूंनी दूषित केलेले.

**–नाशन**–पु. वनस्पति० यवानिका ( ध. २.९३ )
किरमाणी ओवा.

न., हिङ्गुः ( रा. ६.५९ ) हिंग.

**–फल**–पु., वनस्पति० उदुम्बरः ( रा. ११.१३७ ) उंबर.

**–माता**–पु., कृमि० शोणितजः ( चसू. १९.४.( ९ )
एक रक्तज कृमि.

**–मारी**–स्त्री., वनस्पति० निम्बूकः ( रा. ११.१२ ) निंबू.

**–रस**–पु., वनस्पति० अलक्तकः ( रा. ६.१२ ) अळता.

**–हन्त्री**–स्त्री., वनस्पति० विडङ्गम् ( ध. २.११ )
वावडिंग.

**जन्तुका**–स्त्री., वनस्पति० लाक्षा ( रा. ६.१४२ ) लाख.

नाडीहिङ्गु ( ध. २.४० )
एक वनस्पती.

लता० कृष्णवल्ली, वृक्षरुहा, बहुपत्रा, दीर्घफला, तिर्यक्फला कपिकच्छूफलोपमा इत्यस्याः स्वरूपम् ( रा. ३.१२७.२९ ) गुणाः-तिक्ता, शीता, रुचिकरी, दीपनी, पित्तकफघ्नी, दाहतृष्णावमिघ्नी, रक्तदोषनाशिनी ( ध. ४.८८ )
पहा 'जतुका' ही कडु, थंड, रुचकर, अग्निदीपक, कफपित्तनाशक, दाह, तहान, वांती व रक्तदोष-नाशक.

**जन्तुमत्**–वि., कृमियुक्तम् ( अहसू. ५.७ )
कृमियुक्त.

**जन्मन्**–न., जननम् ( चशा. ३.८ )
जन्मणे, जनन.

**( जन्म )–काल**–पु., प्रसवकालः ( सुनि. ८.१४ )
जन्माची वेळ.

**–बलप्रवृत्त**–वि., शुक्रशोणितदुष्टिं विनाऽपि मातुर-पचारबलजातः ( रोगः ) ( ड. सुसू. २४.५ )
जन्मापासून असणारा रोग. शुक्र व आर्तव यांच्या दुष्टी वाचून आईच्या चुकीच्या वर्तनाने झालेला.

**जन्मर्क्ष**–पु., जन्मराशिः ( इन्दुः असंशा० १२.१४ )
जन्मराशी.

जन्मनक्षत्रम् ( सुसू. ३२.४ ) जन्मनक्षत्र.

**जन्मादि**–पु., गर्भाधानकालः जन्मन आदिरुत्पत्तिः कारणं वा, तेन गर्भाधानकालोऽपि ( अरु. अहसू. १.९ )
गर्भधारण, गर्भधारण काळ.

**जप**–पु., कर्म० ईश्वरस्मरणम् । ॐकारपूर्वकगायत्र्याद्या-वर्तनम् 'तज्जपस्तदर्थभावना' इति योगसूत्रमप्य-नुसन्धेयम् ( ड. सुउ. ६०.२८.२९ )
ईश्वराचे सारखे नामस्मरण. मंत्राचे स्मरण, उच्चार-पूर्वक स्मरण.

**( जपा )**–स्त्री., वनस्पति० गुणाः–कटुः उष्णा इन्द्रलुप्त-कनाशकृत् ( रा. १०.३९ )

हिं.—जासन्द.

म.—**जासवन्द.**

गु.—जासुद.

बं.—जाबा.

ता.—शाम्बरात्तै.

जासवंद. टक्कल नाशक प्रसिद्ध. जासवंद गोड चिकट असते. तिखट नसते.

**जमदग्नि**–पु., ऋषि० **रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः** ( चसू. ७.८ )
रोगनाशाच्या विचारविनिमयाकरिता हिमालयाच्या उतरणीवर जमलेल्या पैकी एक ऋषि.

**जम्बीर**–पु., न., वनस्पति० **फणिज्जकः** ( ध. ४.५२ ) आजवला.
**अर्जकः** ( रा. १०.८४ ) आजवला.
**मरुबकः** ( ध. ४.५४ ) आजवला.
**शाक० हरितशाकमुत्तरापथे जम्बीरगन्धि किञ्चिदम्लम्** ( ड ). **तस्य गुणाः—पाचनस्तीक्ष्णः, सुरभिर्मुखवैशद्यकारको रुच्यो, दीपनो, वातकफघ्नः, कृमिनाशकः** ( चसू. २७.१६० सुसू. ४६.२३२ )
एक हिरवी भाजी; निंबूच्या वासाची. किंचित् अम्ल. **गुण**—पाचक दीपक तीक्ष्ण सुगंधी तोंड स्वच्छ करणारी रुचकर वातकफनाशक कृमिनाशक. उत्तरप्रदेशात होते.
**वनस्पति० बृहन्निम्बूकं वक्त्रशोधि दन्तहर्षणं मधुरं अम्लं कटुकं गुरु रुच्यं तर्पणं वातकफघ्नं पित्तलं तृष्णाशूलकफोत्क्लेशच्छर्दिश्वासनिवारणम्** ( सुसू. ४६.१६२ ) **नात्यम्लं जम्बीरं गुरु वातश्लेष्मविबन्धहृच्च कटुकमधुरं अम्लं सुप्रतीतं जम्बीरं रुच्यं दीपनं त्रिदोषघ्नं अतिसारे तर्पणम्। जम्बीरफलगुणाः—तत्रामं-मधुरं अम्लं रुच्यं दीपनं पाचनं बल्यं पथ्यं वातघ्नं पित्तकारकं पक्वफलं मधुरं रुच्यं तर्पणं पुष्टिप्रदं, वर्ण्यं पित्तकफनाशनं वीर्यवर्धनं च** ( रा. ५.१४ )

हिं.—जम्बीर, पहाडी निम्बू.

म.—**लिम्बू.**

गु.—मोटुनिम्बु.

बं.—कर्णनेम्बु.

ता.—पेरिया एलिमिच्चम्.

मोठा निंबू. ईडनिंबू, चकोत्रा–तोंड शुद्ध करणारा. दातांना शहारे आणणारा आंबट गोड तिखट जड रुचकर दीपक पाचक तृप्तिकर वातकफघ्न पित्तवर्धक तृष्णा शूल कफ उचंबळणे ओकारी, श्वासनाशक. वातकफाचा अडथळा कमी करतो. अतीसारात पौष्टिक. वर्णाला चांगला. वीर्यवर्धक.

**जम्बु**–पु., वनस्पति० **जम्बूः** ( चसू. ४.१५ ) जांभूळ.

**जम्बुक**–पु., पशु० **शृगालः** ( चसू. २७.३६ ) कोल्हा.
वनस्पति० **टिण्टुकः** ( १.११५ ) टेण्टु.

( **जम्बुका** ) स्त्री., वनस्पति० **द्राक्षाभेदः, काकलीद्राक्षा,** ( र. ११.७९ ) द्र० '**द्राक्षा**'.
द्राक्षांचा प्रकार.

**जम्बू**–पु., पशु०, **शृगालः** ( र. १८.१७९ ) कोल्हा.
**वनस्पति० फलविशेषः, मधुरः, अम्लः, कषायः, शीतो रुच्यो ग्राही, पित्तकफघ्नो भृशवातलः** ( चसू. २७.१४० ) **मूत्रसंग्रहणीयगणे पुरीषविरजनीयगणे चैकं द्रव्यम्** ( चसू. ४.१५ ) **छर्दिघ्नः** ( चसू. ४.१४ ) **रक्तपित्तशमनः** ( सुउ. ४५.२३ ) **अकण्ठ्यः** ( अहसू. ६.१२८ ) **तस्य पत्राणि कुकूणके रोगे नेत्रधावनार्थमुपयुज्यन्ते** ( सुउ. १९.१३ ) **श्रमदाहकण्ठरोगशोषकासश्वासातिसारकृमिघ्नः स च राजजम्बूकाकजम्बू** ( =क्षुद्रजम्बू ) **भूमिजम्बूभेदेन त्रिविधः। महाजम्बूगुणाः—मधुरः, कषायः, उष्णः, विष्टम्भकरः, श्रमहरः, स्वर्यः, कफघ्नः, शोषश्रमातिसारश्वासकासघ्नः। काकजम्बूगुणाः—मधुरकषायाम्लः, मधुरपाकी, गुरुर्दाहश्रमातिसारघ्नो, वीर्यपुष्टिबलप्रदः। भूमिजम्बूगुणाः—कषायो, मधुरो, ग्राही, पित्तकफघ्नो, हृद्यः, कण्ठदोषघ्नो, वीर्यपुष्टिप्रदः** ( रा. ११. १२८—३५ ) **जम्बूफलास्थिगुणाः–संग्राही** ( चसू. २.२८ ) **दन्तकाष्ठगते विषे जिह्वादन्तौष्ठमांसानां शोथे प्रतिसारणार्थमुपयुज्यते** ( सुक. १.४८—४९ )

हिं.—जामुन, जाम.

म.—**जाम्भूळ.**

गु.—जाम्बूदो.

बं.—कालाजाम.

ता.—नागम्.

**जांभूळ.** गोड, आंबट, तुरट, थंड, रुचकर, मल न बांधणारा, पित्तकफनाशक, अतिवातुळ, ओकारी, रक्तपित्त, श्रम, दाह, कंठरोग, क्षय, खोकला, श्वास, अतिसार, कृमिनाशक, घशाला अहितकारक, मूत्रप्रवृत्ति कमी करणाऱ्या तसेच मळातले दोष घालविणाऱ्या द्रव्यांपैकी एक. इतर जांभळाचे गुण थोड्याफार फरकाने हेच. पानांचा काढा कुकूणक

रोगांत डोळे धुण्यास. राजजांभूळ. काकजांभूळ, भुईजांभूळ असे ३ प्रकार. राजजांभळाला महाजांभूळ असेही नाव आहे.

**वनस्पति० नागदमनी, कटुस्तिक्ता उष्णा तीक्ष्णा त्रिदोषघ्नी उदाराध्मानदोषघ्नी कोष्ठशोधनकारिणी** ( रा. परि. ५.२४–२५ ) नागदवणा.

**–द्वय–** न., वनस्पति० **जम्बूभेदौ, एको राजजम्बूर्बृहत्फलो, द्वितीयः काकजम्बूः स्वल्पफलः** ( ड. सुसू. ३८.४८ ) द्र० ' जम्बू '
जांभूळ जोडी. एक रायजांभूळ दुसरे लहान जांभूळ.

**–फलास्थि–**न., **जम्बूफलस्य बीजम्** ( सुक. १.४९ )
जांभळाचे बी, अठळी.

**–जम्ब्वस्थि–**न., **जम्बूफलास्थिः** ( चचि. १९.५४ )
जांभळाचे बी, अठळी.

**जम्बूक–**पु., पशु० **शृगालः वातकफजोन्मादे जम्बूकस्य पित्तमूत्रशकृल्लोमनखैश्चर्मभिः सेकाञ्जनं प्रधमनं नस्यं धूमं च कारयेत्** ( चचि. ९.७४ )
कोल्हा, वातकफज उन्मादात कोल्ह्याचे पित्त लघ्वी मळ केस नख कातडे यांचा सिंचन अंजन फुंकर नाकात नस्य व धूर करण्यास उपयोग.
**वनस्पति० टिण्टुकः** ( रा. ९.१४२ ) टेटु.
**वनस्पति० केतकी** ( ध. ५.१४ ) केवडा, केवडी.

**जम्ब्वोष्ठ–**न., यन्त्र० **जम्ब्वोष्ठं जम्बूफलसदृशमुखाग्रा कृष्णपाषाणरचिता वर्तिः** ( सुचि. ८.३२ ) **दहनोपकरणेष्वेकम्** ( सुसू. १२.४ )
जांभळासारखा ओठ. यंत्र. जांभळासारखे तोंड व आकार असलेली काळ्या दगडाची वात.

**जम्भ–**पु., वनस्पति० **जम्बीरः** ( ध. ५.१४ )
ईडनिंबु; निंबूची एक जात.

**जम्भल–**पु., वनस्पति० **जम्बीरः** ( ध. ५.१४ )
ईडनिंबू, निंबूची एक जात.
**वनस्पति० अर्कः** ( ध. ४.१३ ) रुई.

**जम्भीर–**पु., वनस्पति० **जम्बीरः** ( रा. ११.१८ )
अजवला.

**जय–**पु., देवता० **विषशमनमन्त्रे उल्लिखितः, ' पिष्यमाणमिमं चात्र सिद्धं मन्त्रमुदीरयेत् । मम माता जया नाम जयो नामेति मे पिता** ( चचि. २३. ९० )
एक देवता. विषाच्या मंत्रात उल्लेख आहे. 'जया' हे आईचे व ' जय ' हे माझ्या बापाचे नाव.

**( जय )–पाल–**पु., वनस्पति० **दन्तीबीजम्** ( ध. १.२२७ ) जयपाळ.

**–पालरस–**पु., पारदयोग० **गन्धकताम्रजयपालयुक्तः पाण्डुशोथघ्नः** ( र., १९.९१–९२ )
पाऱ्याचा योग. पारा गंधक तांबे जयपाळ युक्त. पांडु सूज नाशक.

**–सुन्दर** पु., पारदयोग० **पारदसुवर्णरौप्यताम्रादियुक्तः, सूतिकारोगवन्ध्यत्वघ्नः** ( र. २२.५–१४ )
पाऱ्याचा योग. पारा सोने रुपे तांबे युक्त. बाळंतरोग, वंध्यत्वनाशक.

**जयन्तिका–**स्त्री., वनस्पति० **हरिद्रा** (रा. ६.८१) हळद.

**जयन्ती–**स्त्री.,वनस्पति० **हरिद्रा** ( ध, १.५५ ) हळद.
**अग्निमन्थः** ( ११.५२–५७ ) अरणी, टाकळी.
**चक्रमर्दः** ( र. ३.१०४–५ ) टाकळा, तरोटा.
**बलामोटा** ( ध. ४.१ )
सूक्ष्म मुळांची अगदी हिरवीगार वनस्पती–जयन्ती.

**( जया )** स्त्री., देवता० ( चचि. २३.९० )
एक देवता. विषाच्या मंत्रात उल्लेख आहे.

**जया–**स्त्री.,वनस्पति० **भङ्गा** ( र. १४.३७–४७ ) भांग.
**अग्निमन्थः** ( असंउ. ९ ) अरणी, पांढरी टाकळी.
**हरीतकी** ( र. १८.१३९ ) हिरडा.
**चक्रमर्दः** ( र. १८.१०६.९ ) टाकळा, तरोटा.
**दूर्वाभेदः, नीलदूर्वा** ( रा. ८.२२६ ) **' दूर्वा '**
दूर्वेचा प्रकार, निळी दूर्वा. पहा ' दूर्वा '
**कपिकच्छूः** ( रा. ३.२०१) खाजकुहिली, कवचबीज.
**बलामोटा** ( असंउ. ९ )
सूक्ष्म मुळांची हिरवीचार वेल.
**शमी** ( रा. ८.१५५ ) शमी.
**नीलिनी** ( ध. १.२३३ ) काळादाणा.
**जयन्ती** ( चचि. ९.४५ ) हळद, नरवेल.

**–गुलिका–**स्त्री., योग० **हरिद्रानिम्बवत्सनाभादियुक्ता, क्षयकासपाण्डुकुष्ठादिनाशिनी । भस्मसूतगुडक्षौद्रघृतैः सह निषेवितम् । जरां जयेदतो नाम्ना गुलिकेयं जयोदिता** ( र. २९.१३८–५१ )
एक औषधियोग. हळद निंब बचनाग इत्यादी युक्त. क्षय, कास, पांडु, कुष्ठनाशक.

**–द्वय–**न., वनस्पति० **चक्रमर्दो हरीतकी च** ( अहसू. १५.२१ )
टाकळा आणि हिरडा.

**–युग**–न., **वनस्पति० भङ्गा जयन्ती च** ( र. १९.३९–४१ )

भांग व हळद किंवा नरवेल.

**हरीतक्यग्निमन्थश्च** ( र. १९.३९–४१ )

हिरडा व टाकळा.

**हरीतकी जयन्ती च** ( र. १९.३९–४१ )

हिरडा आणि हळद किंवा नरवेल.

**–वहा**–स्त्री., **वनस्पति० दन्ती** ( ध. १.२२५ ) दांती.

**जयाह्वा**–स्त्री., **वनस्पति० दन्ती** ( रा. ६.३४१ ) दांती.

**जरडी**–स्त्री. **वनस्पति० गर्मोटिका** ( रा. ८.५१ ) पाण्याच्या आश्रयाने होणारी अगदी हिरवीचार वनस्पती.

**जरण**–वि., **पाचनः** ( सुसू. ४५.१८५ ) पाचक.

न., **वार्धक्यम्** ( र. २.७४ ) वृद्धत्व–म्हातारपण.

पु., **जाठराग्निः जीर्यते अशितखादितपीतादिकम् अन्नमनेनेति जरणो जाठराग्निः** ( चवि. ६.२१ ) अन्नपाचक अग्नि.

**वनस्पति० जीरकम्** ( रा. ६.१०० ) जिरे.

न., **हिङ्गुः** ( ध. ३.३६ ) हिंग.

**( जरणा )**–स्त्री., **वनस्पति० कृष्णजीरकम् द्र० जीरक** ( ध. २.७० )

काळे जिरे, पहा 'जीरक.'

**( जरण )–द्रुम**–पु., **वनस्पति० स्निग्धः, कटुस्तिक्तः पित्तास्र–ज्वर–विस्फोट–कण्डु–सिरादोषार्तिकृन्तनः** ( रा. ९.१३ )

**गुण**–तिखट, कडु, स्निग्ध, व पित्तरक्त, ज्वर, फोड, कंडू, शिरोदोषनाशक.

**–शक्ति**–स्त्री., **अन्नपाचनसामर्थ्यम्** ( चवि. ८.१२० ) अन्नपचन करण्याची शक्ति. पचनशक्ति.

**जरत्ता**–स्त्री., **वार्धक्यम्** ( असंउ. ४९ ) म्हातारपण.

**जरद्गव**–पु., **पशु० वृद्धवृषः** ( चसि. ११.२० ) म्हातारा बैल.

**जरा**–स्त्री., **जीर्यति इति जरा वार्धक्यम्, षष्टिवर्षोत्तरमिति** ( चरक ) **सप्ततिवर्षोत्तरमिति** ( सुश्रुतवाग्भटौ; ) **तत्कारणानि,–' पन्थाः शीतं कदन्नं च वयोवृद्धाश्च योषितः। मनसः प्रातिकूल्यं च जरायाः पञ्च हेतवः** ( र. २६.२ ) **जरानाशनार्थं रसायनचिकित्सोपयुज्यते** ( सुचि. २९.३ )

म्हातारपण–साठ वर्षानंतरच्या वयाचा, सत्तर वर्षानंतरच्या वयाचा, **कारणे**–नेहमी प्रवास, थंड अन्न, कदन्न ( हलक्या प्रतीचे निकस अन्न ) आपल्या वयाच्या मानाने अधिक वयाची बायको आणि मनाला प्रतिकूल अशा गोष्टी असणे. **उपचार**– सर्वधातुपरिपोषण करणारे (रसायन) आहार विहार.

**पाकः** ( सुउ. ४६.१२ ) पचन.

**–कास**–पु., **रोग० यो जरया देहक्षयकारिकया कृतः कासः, स याप्यः, यस्तु दोषकृतः स साध्य एव भवतीति दर्शयति** ( चचि. १८.३० )

केवळ म्हातारपणामुळे शरीर क्षीण होत गेल्यामुळे झालेला खोकला. औषध चालू असे पर्यंत वरा. दोषदुष्टीने होणारा साध्य असतो हे येथे सुचविले.

**–शोष**–पु., **रोग० शोषभेदः असौ जरावस्थायां जरया देहक्षयकारिण्या कृत इति ज्ञेयम्। तल्लक्षणानि–कृशो मन्दवीर्यबुद्धिबलेंद्रियः कम्पनोऽरुचिमान् भिन्नकांस्यपात्रहतस्वरः** ( सुउ. ४१.१९ )

क्षयरोग. केवळ म्हातारपणामुळे शरीर क्षीण होत गेल्यामुळे झालेला क्षय. **लक्षणे**–कृश, वीर्य, बुद्धि, शक्ति, इंद्रिये ही मंद, कंप, चव नसणें, फुटलेल्या काशाच्या भांड्यावर ठोका मारल्याने होणाऱ्या आवाजा सारखा आवाज.

**जरायु**–पु., **गर्भस्यावेष्टनरूपं गर्भावरणम्** (सुशा. २.५४) **उल्बाकारो येन वेष्टिताः प्राणिनो जायन्ते उल्बाकार इत्यनेन जरायुसदृशत्वमेव आकारेऽभिप्रेतं नतु केवलमुल्बाकृतिरिति** ( सुशा. ४.७ )

गर्भाचे त्वचे सारखे वेष्टन आवरण, पाणमोटली.

**भैषज्य० अग्निजारः** ( ध. ६.२१ ) अंवर.

**–ज**–पु., **जरायुः–गर्भावरणं, तस्माद् जातो यः, स प्राणी, चतुर्विधभूतग्रामेष्वेको, यथा पशुमनुष्यव्यालादयः** ( काखिल. २२ ) **जरायुः अमरा नाम नाडी येन वेष्टिता मनुष्यादयः प्रजायन्ते** ( चशा. ३.६ )

गर्भावरणातून जन्मलेला प्राणी जरायुज. पशु मनुष्य इत्यादि प्राणी जरायुज होत. चार प्रकारच्या जीवांपैकी एक प्रकार. जरायुला अमरा म्हणतात.

**–प्रपातन**–न., **उपक्रम० जरायोः पातनम्** ( चशा. ८.३१ )

पाणमोटली पाडणे– बाहेर काढणे.

**जर्जर**–पु., **वाद्यभाण्डम्** ( चइ. १.१४ )

एक प्रकारचे वाद्य. वाद्याचे भांडे.

वि., **त्यक्तस्थैर्यम्** ( इन्दुः असंउ. २६ ) अस्थिर.

**जर्जरित**–वि., **पीडितः** ( चचि. २८.१७१ ) पिडलेला.

**जर्जरीकरण**–न., ( परिव. ) **पिष्टीकरणम्** ( चक. १.१४ ) पीठ करणे.

जर्तिल–पु., वनस्पति० तिलः ( ध. ६.१२२ ) तीळ.

जल–न., महाभूत० रसगुणबहुलद्रवद्रव्यम्; उत्पत्तिः–सौम्याः खल्वापोऽन्तरिक्षप्रभवाः प्रकृतिशीता लध्व्यश्चाव्यक्तरसाश्च (चसू. २६.३९ ) पाञ्चभौतिकद्रव्योत्पत्तौ हेतुभूतं, षण्णां रसानां समवायिकारणं, सर्वं जलमैन्द्रं नभस्तलात्पतति । एकत्वेऽपि देशकालाश्रयभेदेन तद्बहुविधं भवति । दिव्यमुदकं प्रकृत्या शीतं शुचि शिवं मृष्टं लघुगुणयुक्तमस्ति । आकाशात्पतितं जलं सोमवाय्वर्कैः स्पृष्टं भवति । हिताहितत्वे तद्देशकालमपेक्षते ।

गुणाः–जीवनं, तर्पणं, धारणं, आश्वासजननं, श्रमक्लमपिपासामदमूर्च्छातन्द्रानिद्रादाहप्रशमनमेकान्ततः पथ्यतमं च ( सुसू. ४५.३ ) हृद्यं, लघु, शीतलं, निर्गन्धम् ( सुसू. ४५.२० ) आश्रयभेदेन जलगुणाः श्वेते कषायं, पाण्डुरके तिक्तकं, कपिले क्षारसंसृष्टम्, ऊषरे लवणान्वितं, पर्वतविस्तारे कटु, कृष्णमृत्तिके मधुरमेतद् महीस्थस्य जलस्य षाड्गुण्यमाख्यातम् ( चसू. २७.१९९–२०१ ) पृथिव्यादीनामन्योन्यानुप्रवेशकृतः सलिलरसो भवत्युत्कर्षापकर्षेण, तत्र स्वलक्षणभूयिष्ठायां भूमावम्लं लवणं च, अम्बुगुणभूयिष्ठायां मधुरं, तेजोगुणभूयिष्ठायां कटुकं तिक्तं च, वायुगुणभूयिष्ठायां कषायं, आकाशगुणभूयिष्ठायामव्यक्तरसं, तत्प्रधानमव्यक्तरसत्वात्, तत्पेयमान्तरीक्षालाभे ( सुसू. ४५.६ असंसू. ६ ) कालभेदेन जलगुणाः–वार्षिकं जलं–गुर्वभिष्यन्दि मधुरं, शारदं–तनु लघ्वनभिष्यन्दि, एतत्तु सुकुमाराणां स्निग्धभूयिष्ठभोजनानां भोज्यभक्ष्यलेह्यपेयेषु च शस्यते । हैमन्तं स्निग्धं वृष्यं बलहितं गुरु, शैशिरं–हैमन्ताल्लघुतरं कफवातजित्, वासन्तिकं–कषायमधुरं रूक्षं, ग्रैष्मिकम्–अनभिष्यन्दि, ( चसू. २७.२०३–६ ) आन्तरीक्षं चतुर्विधं, धारं, कारं, तौषारं, हैममिति; तेषां धारं प्रधानं लघुत्वात्, तत्पुनर्द्विविधं गाङ्गं सामुद्रं चेति । तत्र गाङ्गमाश्वयुजे मासि प्रायशो वर्षति । तयोर्द्वयोरपि परीक्षणं कुर्वीत–शाल्योदनपिण्डमकुथितमविदग्धं रजतभाजनोपहितं वर्षति पर्जन्ये बहिष्कुर्वीत स यदि मुहूर्तं स्थितस्तादृश एव भवति तदा गाङ्गं पततीत्यवगन्तव्यं; वर्णान्यत्वे सिक्थप्रक्लेदे च सामुद्रमिति विद्यात्, तन्नोपादेयम् । सामुद्रमप्याश्वयुजे मासि गृहीतं गाङ्गवद्भवति । गाङ्गं पुनः प्रधानं, तदुपाददीताश्वयुजे मासि । शुचिशुक्लवितानपटैकदेशच्युतमथवा हर्म्यतलपरिभ्रष्टमन्यैर्वा शुचिभिर्भाजनैर्गृहीतं सौवर्णे राजते मृण्मये वा पात्रे निदध्यात् । तत् सर्वकालमुपयुञ्जीत, तस्यालाभे भौमम् ( सुसू. ४५.७ ) अशुद्धजलस्य शुद्धीकरणम्–अग्निक्वथनं, सूर्यातपप्रतापनं, तप्तायःपिण्डसिकतालोष्ट्राणां वा निर्वापणं नाम निक्षेपणं प्रसादनं च कर्तव्यं, नागचम्पकोत्पलपाटलापुष्पप्रभृतिभिश्चाधिवासनमिति ( सुसू. ४५.१२ ) सप्त कलुषस्य जलस्य प्रसादनानि भवन्ति । कतकगोमेदकबिसग्रन्थिशैवालमूलवस्त्राणि मुक्तामणिश्चेति ( सुसू. ४५.१७) पञ्च प्रक्षेपणानि–फलकं त्र्यष्टकं मुञ्जवलयम् उदकमञ्चिका शिक्यं; सप्त शीतीकरणानि '–प्रवातस्थापनं उदकप्रक्षेपणं यष्टिकाभ्रमणं व्यजनं वस्त्रोद्धरणं वालुकाप्रक्षेपणं शिक्यावलम्बनं ( सुसू. ४५.१९) जलपाने पात्रविचारः–सौवर्णे, राजते, ताम्रे, कांस्ये, मणिमये, भौमे वा पात्रे सुगन्धि जलं पिबेत् ( सुसू. ४५.१३ ) भौमं जलं सप्तविधं–नादेयं कौपं सारसं ताडागं प्रास्रवणम्, औद्भिदं चौण्ट्यमिति । नादेयं द्विविधं; एकं तु लघु रूक्षं लेखनं दीपनं वातलं, अन्यत्तु मधुरं गुरु सान्द्रम् अभिष्यन्दि कफकारकं; कौपं–सक्षारं लघु दीपनं पित्तलं कफघ्नं, वाप्यं–सक्षारं कटु पित्तलं वातकफघ्नं, सारसं–मधुरं कषायं लघु बल्यं तृष्णाघ्नं; ताडागं मधुरं–कषायं कटुपाकि वातलं; प्रास्रवणं–लघु दीपनं हृद्यं कफघ्नं; वैकिरं कटु सक्षारं लघु दीपनं कफघ्नं; कैदारं–मधुरपाकि गुरु दोषलम्; औद्भिदं–निम्नप्रदेशादूर्ध्वमुत्तिष्ठमानं जलं वर्षासु पिबेत् महागुणत्वात् । मधुरं पित्तशमनमविदाहि ( सुसू. ४५–७;३१–३५ ) जलग्रहणकालः–सर्वेषामेव भौमानां प्रभाते ग्रहणं शैत्यत्वात् ( सुसू. ४५.२४ ) तत्र वर्षास्वान्तरिक्षमौद्भिदं वा सेवेत महागुणत्वात्; शरदि सर्वं प्रसन्नत्वात्, हेमन्ते सारसं ताडागं वा; वसन्ते कौपं प्रास्रवणं वा; ग्रीष्मेऽप्येवं; प्रावृषि चौण्ट्यमनभिवृष्टं सर्वं चेति ( सुसू. ४५.८ ) स्वस्थे जलपानविधिः–भक्तस्यादौ पीतं जलमग्निसादं कृशाङ्गतां मध्ये पीतं मध्याङ्गतां धातूनां साम्यं सुखं जरणं च; अन्ते पीतं स्थूलत्वमामाशयादूर्ध्वं कफं च करोति; ( असंसू. ६.४१–४२ ) दुर्बलाल्पाग्निगुल्मपाण्डूदरातिसारार्शोग्रहणीशोषशोथिभिरम्बु न पेयम् । स्वस्थोऽपि शरन्निदाघाभ्यां ऋतेऽल्पशः पिबेत् । ( अहसू.

५.१३–१५ ) ऊर्ध्वांगमारुताविष्टा हिक्काश्वासकासिनः उरसि क्षता भुक्त्वा उदकं न पिबेयुः तद्धि कण्ठोरसि स्थितं आहारजं स्नेहं हत्वा भूयो दोषाय कल्पते ( चसू. २७.३२४–५ ) शीतजलगुणाः– मूर्च्छापित्तोष्णदाहविषमदात्ययभ्रमक्लमतमकवम्यूर्ध्वगरक्तपित्तनाशकम् ( सुसू. ४५.२८–२९ ) शीताम्बुनिषेधः–पार्श्वशूलप्रतिश्यायवातरोगग्रहाध्मानस्तैमित्यनवज्वरहिक्कासद्यःशुद्धस्नेहपीता जलं न पिबेयुः ( सुसू. ४५.२९–३० )

उष्णोदकगुणाः–वातकफघ्नं, मेदोघ्नं आमघ्नं, दीपनं बस्तिशोधनं, श्वासकासज्वरहरं, नित्यं पथ्यकरम् ( सुसू. ४५.३९–४० )

स्वादुपाकि, शीतं लघु ( असंसू. ६.३५–३७ ) क्वथितशीतोदकं वर्षासु संचितं पित्तोपशमनार्थमुपयुज्यते । किञ्च पित्तविषमद्यजे ज्वरे हितकारकम् ( सुउ. ६४.९ )

विविधनदीजलगुणवर्णनम्–पश्चिमाभिमुखाः पथ्याः, लघूदकत्वात्, पूर्वाभिमुखास्तु न प्रशस्यन्ते, गुरूदकत्वात्; दक्षिणाभिमुखा नातिदोषलाः, साधारणत्वात् तत्र सह्यप्रभवाः कुष्ठं जनयन्ति, विन्ध्यप्रभवाः कुष्ठं पाण्डुरोगं च, मलयप्रभवाः कृमीन्, महेन्द्रप्रभवाः श्लीपदोदराणि, हिमवत्प्रभवा हृद्रोगश्वयथुशिरोरोगश्लीपदगलगण्डान्, प्राच्यावन्त्याअपरावन्त्याश्चार्शांस्युपजनयन्ति, पारियात्रप्रभवाः पथ्या बलारोग्यकरा इति । शीघ्रवहा नद्योऽमलोदका लघ्व्यो मन्दगाः कलुषाः शैवालसंछन्ना गुर्व्यः ( सुसू. ४५.२१ )

हिमवत्प्रभवा नद्यः पाषाणविच्छिन्नविक्षुब्धाभिहतोदका देवर्षिसेविताः पुण्याः पथ्याः पाषाणसिकतावाहिन्यो नद्यो विमलोदकाः, मलयप्रभवा अमृतोपमं जलं धारयन्ति ( चसू. २७.१०–११ )

व्यापन्नजललक्षणानि–पङ्कशैवालतृणपर्णाविलास्तृतं, सूर्येन्दुपवनादृष्टं, अभिवृष्टं, घनं, गुरु, फेनिलं, जन्तुमत्तप्तमतिशैत्यतो दन्तग्राहि, अनार्तवं, दिव्यं प्रथमार्तवं, लूतादितन्तुविण्मूत्रविषसंश्लेषदूषितम् ( अहसू. ५.६७ )

संस्कारभेदेन जलं–मृद्भ्रष्टलोष्टप्रभवं जलं, तच्च छर्दिघ्नं ( चचि. २०.३० )

सिकताकृतं जलं तृष्णाशामकं, सुवर्णरौप्यादिभिरग्नितसैर्जलं तृष्णाशामकं ( सुउ. ४८.१८ )

पाणी. एक महाभूत. रसगुण अधिक असलेले द्रवद्रव्य.

**उत्पत्ति**–जल हे आकाशातून पडणारे स्वभावाने थंड सौम्य, हलके व ज्याचा रस व्यक्त होत नाही असे द्रव्य आहे. पंचमहाभूत द्रव्याच्या उत्पत्तीला कारणभूत आहे. सहाही रसांचे जल हे समवायी कारण आहे. सर्व ऐंद्रजल हे आकाशातून पडते. मुळात जल हे एक असले तरी ते देश आणि कालाला अनुसरून अनेक प्रकारचे होते व ते तदनुसार हितकर अथवा अहितकर होते. आकाशातून पडणारे जल पवित्र कल्याणकर व स्वच्छ असते त्याला चंद्र सूर्य आणि वायु यांचा स्पर्श होतो.

**पृथ्वीच्या संसर्गानें आलेले पाण्याचे गुण**– **पांढऱ्या जमिनीतील** पाणी तुरट; **भुरकट** जमिनींत कडू; **पिवळट जमिनीत** क्षारयुक्त; **खाऱ्या जमिनीत** खारट; **पर्वताच्या विस्तारात** तिखट आणि **काळ्या जमिनीत** गोड असते.

पृथ्वीगुणभूयिष्ठ जमिनीतील जल अम्ल आणि लवण.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| जल | ” | ” | ” | ” | गोड. |
| तेज | ” | ” | ” | ” | तिखट व कडु. |
| वायु | ” | ” | ” | ” | तुरट. |
| आकाश | ” | ” | ” | ” | अव्यक्त. |

( आकाशातून पडणारे पाणी न मिळाल्यास आकाशगुण भूयिष्ठ भूमीतील पाणी घ्यावे. )

**कालानुसार पाण्याचे गुण**–

**वर्षाऋतु**–जड आणि आर्द्रता निर्माण करणारे व गोड.

**शरदृतु**–हलके व निर्मळ असून आर्द्रता कमी करणारे असते. हे पाणी सुकुमारव्यक्ति, स्निग्ध आहार करणारे व चतुर्विध आहार सेवन केल्यावर घेण्यास प्रशस्त असते.

**हेमंतऋतु**–स्निग्ध, जड, शुभ व बलाला हितकर

**शिशिरऋतु**–हेमंतापेक्षा अधिक हलके व कफवात नाहीसे करणारे असते.

**वसंतऋतु**–तुरट. गोड व रूक्ष असते.

**ग्रीष्मऋतु**–आर्द्रता न करणारे असते.

**आकाशातील जलाचे प्रकार** ४ धार, कार, तौषार आणि हैम.

१ **धार**–धारांनी पडणारे सर्वात श्रेष्ठ. कारण ते हलके असते. ह्याचे २ प्रकार. एक गांग आणि दुसरे सामुद्र. यांतील गांग हे आश्विन व कार्तिक महिन्यात पडणारे व त्या शिवाय इतर महिन्यात पडणारे ते सामुद्र होय.

१ **गांगजल परीक्षा**-शुद्ध चांदीच्या भांड्यात उत्कृष्ट जातीच्या तांदुळाचा शिजवलेला भात ठेवून त्यावर पावसाचे पाणी शिंपून सुमारे एक तास ठेवावा. जर तो भात एवढ्या अवकाशात फसफसला नाही किंवा कुजू लागला नाही आणि ठेवल्या स्थितीप्रमाणेच चांगला राहिला तर ते गांगजल समजावे. पण याच्या उलट स्थिति असून शिवाय त्या भाताला पाणी सुटले किंवा रंग बदलला तर ते सामुद्र समजावे, हे पिण्याला अयोग्य होय.

हे गांगजल शुद्ध स्वच्छ पांढऱ्या मोठ्या वस्त्राच्या पदरातून गाळून घ्यावे. गच्चीवर पडलेले किंवा मोठ्या स्वच्छ भांड्यात धरून सोने चांदी किंवा मातीच्या पात्रात भरून सर्वकाळ उपयोगात आणावे. याच्या अभावी जमिनीतील पाणी घ्यावे.

२ **कार**-गारांचा वर्षाव होऊन मिळणाऱ्या पाण्याला कारजल म्हटले आहे.

३ **तौषार**-दंव बिंदूंचे तुषार स्वरूप जल हे तौषार जल होय.

४ **हैम**-हिम म्हणजे वर्फ; त्याचे विरून होणारे पाणी ते हैम होय.

वस्तुतः नित्योपयोगाच्या दृष्टीने कार, तौषार आणि हैम ह्यांचा मानवाला प्रत्यक्ष असा उपयोग नसतो; म्हणूनच धार हे जल सर्व श्रेष्ठ म्हटले आहे. **अशुद्ध जलाचे शुद्धीकरण**-१ पाणी उकळून २ सूर्याच्या उन्हांत तापवून ३ लोखंडाचा तापवून लाल केलेला गोळा, मातीचे ढेकूळ तापवलेले किंवा तापलेली वाळू पाण्यात बुडवून पाणी शुद्ध करता येते.

**सुवासिक जल**-नागचाफा, कमळ, पाडळी, मोगरा, वाळा इ० च्या द्वारे पाणी सुगंधित करता येते.

**गढूळ पाणी स्वच्छ करणे**-निवळीचे बी, गोमेदमणी, कमलमूळ, शेवाळमूळ, ही पाण्यात टाकून ठेवल्याने अथवा मोती, स्फटिकमणी यांनीही गढूळ पाणी निवळते.

**पाणी ठेवण्याची स्थाने**-पाण्याची भांडी प्रत्यक्ष जमिनीवर ठेवल्याने जमीन ओली होते व जमिनीवरील काडी केर कचरा पाण्यात येणे शक्य असते ते टाळण्यासाठी १ सावरी किंवा इतर कणखर लाकडाच्या फळीवर २ तिवईवर, ३ मोळ वगैरे गवताचे बलय ( चुंभळ ). ४ वेताचे किंवा वेळूचे विणून सभोवार वेष्टून टांगता येईल असे आवरण ५ आणि शिंके. अशा पाच साधनांचा उपयोग होतो.

**पाणी थंड करणे**-१ भरपूर हवा असेल तेथें ठेवणे. २ थंड पाणी एका मोठ्या भांड्यात भरून त्यात ह्या पाण्याचे भांडे वस्त्र गुंडाळून गळ्याइतके बुडवून ठेवणे. ३ लाकडाचा स्वच्छ दांडा पाण्यात फिरवीत राहाणे. ४ पंख्याने वारा घालणे. ५ पाण्याच्या भांड्याला वस्त्र गुंडाळून हवेत उघडे टांगणे किंवा वारंवार गाळून घेणे. ६ वाळूच्या ढिगाऱ्यात पाण्याचे भांडे फसवून ठेवणे. ७ किंवा शिंक्यावर उंच हवेत टांगून ठेवणे अशा ७ उपायांनी पाणी थंड करता येते.

**पाण्याचे सामान्य गुण**-जीवनशक्ति दायक, तृप्तिकर, पुष्टिकर, शरीर धारक, श्रमाने शरिरास आलेली शुष्कता घालवून आर्द्रता आणि आनंद निर्माण करणारे, तहान, थकबा, गुंगी, मूर्च्छा, निद्रा, झापड, दाह यांचे प्रशमन करणारे, हृदयाला हितकर, हलके, थंड, वासरहित आणि संपूर्णतया हितावह आहे.

**भौमजल.** जमिनीतले पाणी. प्रकार सात; नदी, आड, सरोवर, तळे, झरा, जमिनीतून झरा व न बांधलेला आड यांचे पाणी. नदीच्या पाण्याचे प्रकार दोन; पैकी एक हलके रूक्ष अग्निदीपक दोष घासून काढणारे व वायुवर्धक. दुसरे गोड जड द्रवता थोडी कमी असलेलें स्राव वाढविणारे कफकर. **आडाचे** क्षारयुक्त कडु हलके कफनाशक पित्तवर्धक; **विहिरीचे** आडाच्या पाण्यासारखेच वात कफ नाशक; **सरोवराचे** गोड तुरट हलके तहान नाहीशी करणारे; **तलावाचे** गोड तुरट पचल्यानंतर तिखट व वातवर्धक; **झऱ्याचे**; हलके अग्निदीपक कफनाशक हृदयाला हितकारक **नदीतल्या** झऱ्याचे तिखट क्षारयुक्त हलके अग्निदीपक व कफनाशक. **पाटाचे** पचल्यानंतर गोड जड दोषवर्धक. **जमिनीतून वर उसळून येणारे-तळच्या झऱ्याचे** गोड पित्तशामक घशाशी जळजळ न करणारे हे पावसाळ्यात उत्तम. **पाणी घेण्याचा काल.** जमिनीतले सर्व प्रकारचे पाणी पहाटे, सकाळी भरावे. ते थंड असते. **ऋतूपरत्वे चांगले पाणी पावसाळ्यात** आकाशातले जमिनीतील तळच्या झऱ्याचे उत्कृष्ट गुणांचे; **शरदात सर्व कोणते-ही** प्रसन्न असते. **हेमंतात** सरोवर, तलाव यांचे; **वसंतात** किंवा **ग्रीष्मात** आड किंवा झऱ्याचे; **आषाढ श्रावणात** लहान विहिरींचे-पाऊस नाही तोपर्यंत सर्व. **निरोग्याचा जलपान विधि**-

जेवण्याच्या प्रारंभी अग्नि कमी करते व शरीर कृश करते, मध्ये मध्यम शरीर, धातूचे साम्य, व सुखाने अन्न जिरते. शेवटी प्याल्याने शरीर स्थूल व शरिराच्या वरच्या भागांत कफ होतो. **पान-विचार**-सोने रुपे तांबे कासे स्फटिकमणी मातीचे भांडे यात पाणी ठेवावे व तशाच भांड्यांनी प्यावे. वाळा मोगरा इ० जो वास आवडेल तो त्यात घालावा. **पाणी वर्ज्य**–दुर्बळ अग्नि थोडा गुल्म पांडु उदर अतिसार मूळव्याध ग्रहणी क्षय सूज असलेल्यानी पाणी पिऊ नये. निरोग्याने ही शरद् व ग्रीष्म ऋतूंखेरीज थोडे थोडे प्यावे. नित्य गाणारे बोलणारे अध्ययन करणारे घसा डोके यात वात-विकार उचकी श्वास खोकला उरःक्षत असलेले यांनी जेवणानंतर पाणी पिऊ नये. ते घसा व छातीत असलेला आहाराचा स्निग्धांश नाहीसा करून अति दोष निर्माण करते. **थंड पाण्याचे गुण**–मूर्च्छा पित्त उष्णता आग विष मद्याचे विकार भ्रम थकवा अंधेरी ओकारी वरच्या द्वारांनी होणारा रक्तस्राव नाहीसा होतो. **थंडपाणी वर्ज्य**-फास-ळ्यातला शूळ पडसे वातरोग भूतबाधा पोटफुगी अंग ओलसर असणे नवज्वर उचकी रेचक इत्यादीनी शरीर शुद्धि केलेले व स्नेह प्यालेले यांना थंडपाणी वर्ज्य. **ऊन पाण्याचे गुण**–अग्निदीपक आम मेद वातकफ नाशक बस्तिशोधक श्वासकासज्वरहर नेहमी पथ्यकर पचनानंतर गोड थंड हलके. **कढवून थंड केलेले** वर्षाकाळात संचित झालेले पित्तशमन व्हावे म्हणून वर्षाऋतूच्या शेवटी व शरदऋतूत उपयुक्त. पित्त विष व मद्य यांपासून होणाऱ्या ज्वरात हितकर–**नदीचे पाणी–पश्चिमाभि-मुखीचे** हलके म्हणून पथ्यकर. **पूर्वाभिमुखीचे** जड म्हणून अपथ्यकर, सह्याद्रीतून निघणाऱ्यांचे कुष्ठ विंध्याद्रीच्या नद्यांचे कुष्ठ व पांडुरोग करते. **वेगाने वाहाणाऱ्याचे** निर्मळ व हलके आणि **मंद वहाणाऱ्यांचे** गढूळ शेवाळाने आच्छादलेले जड. मलयाच्या ( मलबार ) नद्यांचे अमृतोपम. **बिघड-लेले पाणी लक्षणे**–चिखलाने गढूळ शेवाळ गवत पाने यांनी झांकलेले अस्वच्छ जड फेसाळ जंतुयुक्त तापलेले सूर्य चंद्र वारा यांचा स्पर्श न झालेले पावसाचे नवे अति थंड भलत्याच ऋतूत पडलेले पावसाचे ( पहिल्या पावसाचे ) किडेजंतु विष्ठामूत्र विषमिश्र असते.

**संस्कार केलेले**–मातीचे ढेकूळ किंवा वाळू सोने रुपे तांबे इ० तापवून लाल करून पाण्यात टाकून ते गाळून दिल्याने तहान शमते. **थंड पाण्याचे उद्वेजन**–डोक्याला जखम होऊन मज्जा, मज्जाजल इ० स्राव होऊन क्षय इ० असताना थंड पाणी शिंपडावे.

**गढूळ पाणी स्वच्छ करण्याकरिता** निवळीचे बी, गोमेदमणी कमळमूळ शेवाळ किंवा पद्मकाष्ठ मूळ कापड आणि मोती यांचा उपयोग करावा. **पाणी ठेवण्याकरिता** फळी तिवई मुंजाची चुंभळ वेताची उंच बनवलेली बैठक शिंके यांचा उपयोग केल्यास इतर दोष उत्पन्न होत नाहीत. **पाणी थंड करण्याचे सात उपाय**–वाऱ्याच्या झोतांत वाळूत शिंक्यावर पाणी ठेवावे. पाण्याच्या भांड्याला ओले फडके लावून त्यावर पाणी शिंपडणे पंख्याने वारा घालणे. पाण्यात छडी फिरवणे, कपड्यातून गाळणे.

**शरीरस्थः अब्धातुः; शरीरे तस्य दशाञ्जलिप्रमाणम्** ( चशा. ७.१५ )

शरिरामधला जलीय शरीरधारक घटक. त्याचे दहा अंजलि प्रमाण.

न., **क्वाथः** ( सुचि. ९.२३ ) काढा.

**वनस्पति० उशीरम्** ( चचि. ७.१३० ) काळावाळा.

**वालकम्** ( चसू. ३.२७ ) वाळा.

**–काम**–पु., **वनस्पति० वेतसः** ( ध. ५.११७ ) जलवेतस.

**–कामुका**–स्त्री., **वनस्पति० कुटुम्बिनी** ( रा. ५.२१ ) क्षीरिणी. पाण्यात होणारी दुधाळ वनस्पती.

**–कूर्मक**–न., **रोग० उदरभेदः, कूर्मरोगः** ( र. २२.२८ )

एक रोग. उदराचा एक प्रकार.

**–कोष्ठक**–पु., **जलद्रोणी, अवगाहनोपयोगि मह-त्पात्रम्** ( चसू. १४.३४ ) पाण्याची डोणी.

कमरेपासून खालच्या भागाचा घाम काढण्यास व त्याला शेकण्यास उपयुक्त.

**–गण्ड**–पु., **वनस्पति० जलगण्डीरकः** ( ड. ) जलपिप्पलिका ( सुचि. ९.२१ ) जलपिंपळी.

**–गद**–पु., **रोग० उदररोगः** ( र. १८.२०७–९ ) उदररोग.

**–गर्भता**–स्त्री., **रत्नदोषः पानीयगर्भताख्यः** ( र. ४.३६ )

रत्नाच्या गाभ्यात पाण्यासारखे थेंब दिसणे.

**–चारिन्**–पु., **जलचरः** ( असंसू. ७.१०६–८ ) पाण्यात रहाणारे–जगणारे.

**–ज**–पु., **जले जातः इति जलजः प्राणिविशेषः** ( चसू. २४.७ ) पाण्यात उत्पन्न झालेले.

**वनस्पति० –हिज्जुलः** ( रा. ८.७० ) जलवेतसाचा प्रकार.

**भैषज्य० शङ्खः** ( रा. १३.२४३ ) शंख.

**मौक्तिकम्** ( र. २३.६१ ) मोती.

**वनस्पति० जलमुस्तम्** ( ध. १.४३ ) पाणमोथा. नागरमोथा.

**कमलम्** ( रा. १०.२४३ ) कमळ.

**शालिः** ( ध. ६.७१ ) साळ–भाताचा प्रकार.

**भैषज्य० लवणभेदः लवणारम्** ( रा. ६.५३ ) मीठ–मिठाचा एक प्रकार.

**–जन्मन्**–स्त्री., **प्राणि० जलौकाः** ( अहसू. २६.५३ ) जळू.

**–त्रास**–पु., **रोग० व्याधितेन श्वादिना दष्टस्य श्लेष्मा प्रकुपितश्चेतोवाहिनीर्धमनीरनुप्रविश्य संज्ञानाशमापादयति सद्यः कालान्तराद्वा । ततो नरः स्पृष्ट्वा दृष्ट्वा, श्रुत्वा, वा जलं त्रस्यति । एतज्जलत्रसनं रिष्टं, मरणलक्षणं कीर्तितम्** ( सुक. ७.४८ –४९ )

जलसंत्रास. कुत्रे कोल्हा इत्यादी प्राणी चावल्याने कफ प्रकुपित होऊन संज्ञावाहक धमनींना दुष्ट करून संज्ञानाश करतो. पाणी पाहून त्याचा शब्द ऐकून त्याला स्पर्श करून तो त्रासतो. हे मरणसूचक लक्षण आहे.

**रोग० अत्र रेवतीग्रहावेशाद् जलत्रासः** ( का. रेवतीकल्प. ६९ )

रेवती ग्रहबाधेने जलसंत्रास होतो.

**–द**–पु., **वनस्पति० मुस्ता** ( ध. १.४१ ) नागरमोथा.

**मधुकः** ( ध. ५.४८ ) ज्येष्ठमध.

**भैषज्य० शङ्खः** ( ध. ३.१७९ ) शंख.

**खनिज० अभ्रकम्** ( र. १२.२२ ) अभ्रक.

**–दात्यय**–पु., **कालविभाग० शरदृतुः** ( चक. चक. ७.५७ ) शरदृतु.

**–दोष**–पु., ( परिव० ) **जले गन्धवर्णरसादिषट्प्रकाराभिव्यज्या व्यापत्तिरूपा दोषाः** ( सुसू. ४५.११ ) पाण्याचा वास रंग रस इ० सहा प्रकार विकृत होणे.

**–द्रोणी**–स्त्री., **बृहत्पात्रम्** ( र. ७.६ ) डोणी. घंगाळ.

**–धर**–पु., **वनस्पति० तिनिशः** ( रा. परि. ९.२४ ) तिवस.

**–धिफेन**–पु., **भैषज्य०** ( र.२३.४७ ) **समुद्रफेनः** समुद्रफेन.

**–नील**–न., **रत्न० नीलमणेः प्रकारविशेषः** ( र. ४.५१ ) नील रत्नाचा प्रकार.

**( –नीली )**–स्त्री., **वनस्पति० जलमुस्तम्** (रा. ८.६४) नागरमोथा. पाणमोथा.

**–पिप्पलिका**–स्त्री., **वनस्पति० तिक्ता, कषाया, शीता, लघु, हृद्या, रुच्या, रूक्षा, दीपनी, शुक्रला, संग्राहिणी, रक्तदाहव्रणापहा.** ( भाप्र. ) **श्वासभ्रममूर्च्छातृष्णापहा** ( ध. ४.६४ )

हिं.—जलपीपर, पनिसिगा.

म.—**जल पिंपळी.**

गु.—रतवेलियो.

बं.—पनिसिगा.

फा.—पीपलआवी.

जल पिंपळी. ही कडु तुरट थंड हलकी रूक्ष रुचकर अग्निदीपक मळ बांधणारी शुक्रवर्धक श्वास भ्रम मूर्च्छा तहान रक्तदुष्टि दाह व्रणनाशक.

**शाक० कटूष्णतीक्ष्णरूक्षा, वातकफहरा** ( चसू. २७.१७१ )

भाजी. तिखट उष्ण तीक्ष्ण रूक्ष वातकफहर.

**–पिप्पली**–स्त्री., **वनस्पति० महाराष्ट्री** ( रापरि. ४.१३ ) जलपिंपळी, मराठी.

**–बन्ध**–पु., **पारदबन्ध० शिलोदकादिविशिष्टैर्जलैर्बन्धनम्** ( र. ११.८८ )

पाऱ्याची एक गोळी. शिलोदक इत्यादी द्रव्यांच्या सहाय्याने केलेली पाऱ्याची गोळी.

**–बस्ति**–पु., **जलदृतिः** ( चचि. २५.५२ ) पाण्याची पखाल. बुधला.

**–बिन्दुजा**–स्त्री., **वनस्पति० यावनाल** ( रा. १४.१६३ ) जोंधळा.

**–मञ्जरी**–स्त्री., **पारदयोग० पारदगन्धकमरिचादियुक्ता, नवज्वरघ्नी** ( र. १२.१४८–५१ )

पारा गंधक मिरी इ० युक्त एक औषधियोग; नवज्वरहर.

**–मण्डपिका**–स्त्री., **वनस्पति० शैवालम्** ( र. १८.२३५ ) शेवाळ.

**वारिपर्णी** ( र. १८.२३५–३६ ) शेवाळ, जलकुंभी.

**जलकुम्भी** ( र. १८.२३५–३६ ) कुंभी, जलकुंभी.

**–मधूक**–पु., वनस्पति० गुणाः–मधुरः शीतो बल्यो रसायनो वृष्यश्छर्दिघ्नः ( ध. ५.४९ )
ज्येष्ठमध. गोड थंड बल शुक्रवर्धक रसादिधातुपरिपोषक. ओकारीनाशक.

**–मुस्त**–न., वनस्पति० कटुतिक्तकषायं 'शीतं, स्निग्धं, कान्तिकरं, मेध्यं, वातघ्नं, अन्धताविसर्पकण्डुकुष्ठविषसंतापव्रणघ्नम्' ( ध. १.४३ )
पाणमोथा. नागरमोथा. तिखट कडु तुरट थंड स्निग्ध कांतिवर्धक धारणाशक्ति वाढविणारा वातघ्न आंधळेपण धावरे कंडु कुष्ठ विष संताप व्रणनाशक.

**–मृत**–पु., जले मृतः, जलपानेन मृतः, तस्य लक्षणानि विष्टब्धपायुमूर्धाक्षमाध्मातोदरमेहनं शीतपादकराननं जानीयात् ( चक्र, चचि. १०.४७ )
पाण्यात बुडून मेलेला. **लक्षणे**–गुद, डोके, डोळे ताठ, पोट व मूत्रेंद्रिय फुगलेले, पाय, हात, तोंड थंड.

**–मृत्तिका**–स्त्री., भैषज्य० जीर्णकिट्टरजो बब्बुलक्काथेन परिमर्दितं गुडचूर्णसमन्वितं लेहवत्कृतम्–इयं हि जलमृत् ( र. ९.६२–६३ )
पाणमाती. मंडूराचे चूर्ण व गूळ बाभळीच्या काढ्यात खलून चाटणासारखी करावी.

**–मृद्**–स्त्री., जलमृत्तिका ( र. ९.६२ )
पाण्याने न विरघळणारी कृत्रिम माती. लोखंडाचे चूर्ण गूळ इ० द्रव्ययुक्त. पहा 'जलमृत्तिका'

**–यन्त्र**–न., यन्त्र० रसायनोपयोगि, घटसंपुटे पारदगन्धकादिकं संस्थाप्य तदधोऽग्निरुपरिष्टाच्च जलं यस्मिन् स्थाप्यते, तादृग्रचनाविशिष्टमेकं यन्त्रम् ( र. १७.२ )
एक यंत्र. पाणयंत्र. मातीच्या मोठ्या तोंडाच्या मडक्यात पारा गंधक इत्यादी द्रव्ये ठेवून खाली अग्नि व वर पाणी ठेवलेले असते ते.
**जलसिञ्चनसाधनम्** ( चचि. २४.१५८ )
पाणी शिंपडण्याचें साधन. झारी.

**–योग**–पु., उपक्रम० शीतजलपूरितकटाहे उपक्रम्यं नरम् आकण्ठं मज्जयित्वा तत्रैव तदुपवेशनम् ( र. १२.११३–११४ )
थंड पाण्याने भरलेल्या डोणीत रुग्णाला गळ्यापर्यंत बुडवून तेथेच बसवावे.

**–रोध**–पु., जलनिरोधयुक्तप्रदेशः ( सुसू. २९.२२ )
पाणी येऊ शकणार नाही असे स्थान.

**–वल्ली**–स्त्री., वनस्पति० शृङ्गाटकः ( रा. ७.१८ )
शिंगाडा.

**–वहनाडी**–स्त्री., स्रोतो० उदकवहस्रोतः ( र. १३.४८ ) जल–द्रववहस्रोतस.

**–वहस्रोतस्**–न., स्रोतो० उदकवहस्रोतः ( मुनि. ७.२२ ) जल–द्रववह स्रोतस.

**–वास**–पु., वनस्पति० विष्णुकन्दः ( रा. ७.४० )
पुष्कळ व चांगली पुडे असणारा मोठा लंबगोल पाण्यात होणारा कंद.
न., **उशीरम्** ( रा. १२.२५ ) वाळा.

**–( वासा )**–स्त्री., वनस्पति० गुण्डासिनी ( रा. ८.६६ )
मुळांचा गुच्छ असणारी चापट गवताच्या पानांसारखी पाने असलेली पाण्यात होणारी वनस्पती.

**–विक्रमा**–स्त्री., वनस्पति० सल्लकी ( रा. ११.१९६ )
सुगंधी. सुगंधीमुळांची व फळांची आस्वादाला सुखद, त्रिकोणी फळांची व सुगंधी डिंक असणारी.

**–वेतस**–पु., वनस्पति० वेतसः ( असंउ. ४६ )
जलवेतस.
**वानीरः** ( रा. ९.१७ )
नदीत होणारा खूप फांद्या असलेला वाटोळ्या फुलांचा एक जलवेतस.

**–शुक्ति**–स्त्री., प्राणि० कोशस्थवर्गे निर्दिष्टः ( सुसू. ४६.१०८ )
नदीच्या पाण्यात होणारी शिंप. कोशस्थ प्राणी. शिंपला. शिंपली.

**–शूक**–पु., वनस्पति० शैवालम् ( असंउ. २२ )
शेवाळ.
**जलनीलिका, जलान्तर्वर्ती रोमयुक्तः सविषप्राणी वा** ( सुसू. १६.१९ )
पाण्यात राहणारा केसाळ विषारी प्राणी.

**–सन्त्रास**–पु., रोग० जलत्रासः (असंउ. ४६.३६७)
जलसंत्रास. पहा 'जलत्रास'.

**–संभव**–पु., वनस्पति० वानीरः ( रा. ९.१७ )
पहा 'जलवानीर.'

**–स्था**–स्त्री., वनस्पति० दूर्वाभेदः गण्डदूर्वा द्र० दूर्वा. ( रा. ८.२३४ ) गाठी दूर्वा.

**–स्राव**–पु., नेत्ररोग० पैत्तिकविकारः, असाध्योऽयम् ( सुउ.१.३१ )
डोळ्याची गळ, स्राव. पित्तजविकार, असाध्य.

**–हारिणी**–स्त्री., प्रणाली ( सुशा. ७.३ ड. ) पाट.

**–हारियन्त्र**–न., यन्त्र० वलभीयन्त्रम्, खलचरीयन्त्रम् ( र. ९.४७–४९ ) या नावाचे यंत्र.

**जलाख्यक**–पु., वनस्पति० जलमधूकः ( ध. ५.४९ ) पाण ज्येष्ठमध, पाण्यातले ज्येष्ठमध.

**जलाधार**–पु., पात्र० तोयाधारः ( र.९.७–८ ) पाण्याचा संचय, तळे.

**जलाभ**–वि., जलसमानः जलवत् ( स्रावः ) ( चचि. २६.१०५ ) पाण्यासारखा ( स्राव ).

**जलाभिरमण**–न., जलातिक्रीडनम्, जलसंतरणादि ( सुउ. ४०.५ ) जलक्रीडा, पोहणे इ०

**जलामोद**–न., वनस्पति० उशीरम् ( रा. १२.२६ ) काळावाळा.

**जलायुका**–स्त्री., कीट० जलौकाः ( सुक. ३.४ ) जळू.

**जलाराति**–स्त्री., वनस्पति० अगस्त्यभेदः, रक्तागस्त्यः ( र १७.१२१ ) तांबडा हदगा. पहा ' अगस्त्य '

**जलार्बुद**–न., ओष्ठरोग० वातकफाज्जलबुद्बुदवदोष्ठे जलार्बुदं भवति ( असंउ. २५ ) पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणे ओठावर होणारे आवाळू.

**जलालु**–पु., वनस्पति० पानीयालुः ( रा. परि. ७.२ ) पाण्यात होणारा अळू.

**जलालूक**–न., वनस्पति० पद्ममूलम् ( ध. ४.१६३ ) कमळमूळ.

**जलावह**–पु., वनस्पति० मुस्ता ( ध. १.४१ ) नागरमोथा.

**जलाशया** स्त्री., वनस्पति० गुण्डाला ( रा. परि. ५.४२ ) बुंधा गुच्छासारखा असणारी पाण्यात होणारी वनस्पती.

**जलाश्रय**–पु., वनस्पति० गुण्ड ( रा. परि. ८.६१ ) कांडे त्रिकोणी लांब पाने निळी तलवारीच्या पात्या-सारखी असणारा वृक्ष.

न., वनस्पति० लामज्जकम् ( ध. ३.८६ )

**( जलाश्रया )**–स्त्री., वनस्पति० गर्मोटिका ( रा. परि. ८.५१ ) पाण्याच्या आश्रयाने होणारी हिरवीचार वनस्पती.

[illegible] ( रा. परि. ८.६८ )

[illegible] नसलेली, टोंकदार पानांची, मऊ, बुळ-बुळीत व पाण्याच्या आश्रयाने होणारी म्हशीला आवडणारी वनस्पती.

शृङ्गाटकः ( रा. परि. ७.१८ ) शिंगाडा.

**जलास्रव**–पु., नेत्ररोग० वायुः क्रुद्धो जलवाहिनीः सिराः प्राप्य वर्त्मशुक्लसन्धिकनीनकाजलाभमश्रु स्रावयति तेन नेत्रं सरुग्रागशोफं स्यात् ( असंउ. १३ ) डोळ्याची गळ–वायु अश्रुवाहिनी शिरा दुष्ट करून अश्रूंचा स्राव करतो. डोळा वेदना लाली व सूज युक्त.

**जलूका**–स्त्री., कीट० जलौका ( र. २२.१४७–५० ) जळू.

**बन्ध**–पु., पारदबन्ध० ( र. ११.६५ ) बद्ध पाऱ्याचा प्रकार. पाऱ्याचा बंध.

**जलेचर**–पु., जले चर्या यस्य सः जले चरति इति जलेचरः ( चसू. २७.५४ ) एतन्मांसगुणाः– मधुरम्, उष्णं, गुरु, स्निग्धं, वृष्यं, बलोपचयवर्धनं, व्यायामिदीप्ताग्नीनां च हितकरं, वातहरं, कफपित्त-वर्धनम् ( चसू. २७.५७–५८ ) जलचर. पाण्यात जीवन असलेला. याच्या **मांसाचे गुण**–गोड उष्ण जड स्निग्ध शुक्रवर्धक बल पुष्टि वाढविणारे व्यायाम करणाऱ्याला व अग्नि प्रदीप्त असणाऱ्याला हितकर वातहर कफपित्त वाढविणारे.

**जलेरुहा**–स्त्री., वनस्पति० कुटुम्बिनी ( रा. परि. ५.२२ ) पाण्यात होणारी दुधाळ वनस्पती.

**जलेशय**–पु., जलचरप्राणी ( चवि. ३.७ ) जलचर प्राणी.

**जलोदर**–न., रोग० उदरम् ( र. १९.१ ) पाणी झालेले उदर.

**जलोद्भव**–न., नेत्राञ्जनविशेषः स्रोतोञ्जनम् ( सुउ. १७.४० ) सुरमा.

भैषज्य० शङ्खः ( सु. उ. १७.४० ) शंख.

**( जलोद्भवा )**–स्त्री., वनस्पति० ब्राह्मी, लघुब्राह्मी ( रा. ५.१५१ ) ब्राह्मी, लहान ब्राह्मी.

**जलोद्भूता**–स्त्री., वनस्पति० गुण्डाला ( रा. परि. ५.४२ ) बुंध गुच्छाकार असलेली पाण्यात होणारी वनस्पती.

**जलौकस्, जलौका**–स्त्री., कीट० जलायुका ( सुक. ३.५ ) जलूका ( र. २२.१४७–५० ) जल-मासामायुरिति जलायुकाः, जलमासामोक इति जलौकसः ( सुसू. १३.९ ) ता द्विविधाः सविषा निर्विषाश्च, तत्र दुष्टाम्बुसर्पमण्डूकमत्स्यादिशव-कोथमूत्रपुरीषजा रक्तश्वेतातिकृष्णतनुस्थूलचपल-पिच्छिलाः स्थूलमध्या रोमशाः शक्रायुधवद्विचित्रो-र्ध्वराजीचिता वा सविषाः । पद्मोत्पलसौगन्धि-कादिसुगन्धविमलविपुलसलिलशैवालजाः शैवाल-श्यावा नीलोर्ध्वराजयो वृत्ताश्च निर्विषाः ( असंसू. ३५.४ ) तत्र सविषाः–कृष्णा, कर्बुरा, अलगर्दा, इन्द्रायुधा, सामुद्रिका, गोचन्दना चेति । तासु, अञ्जनचूर्णवर्णा पृथुशिराः कृष्णा वर्मिमत्स्य-वदायता छिन्नोन्नतकुक्षिः कर्बुरा, रोमशा महापार्श्वा

कृष्णमुखी अलगर्दा; इन्द्रायुधवदूर्ध्वराजिभिश्चित्रा इन्द्रायुधा; ईषदसितपीतिका विचित्रपुष्पाकृतिचित्रा सामुद्रिका, गोवृषणवदधोभागे द्विधाभूताकृतिरणुमुखी गोचन्दनेति । ताभिर्दष्टे पुरुषे श्वयथुरतिमात्रं कण्डूर्मूर्च्छा ज्वरो दाहश्छर्दिर्मदः सदनमिति लिङ्गानि भवन्ति । तत्र महागदः पानालेपननस्यकर्मादिषूपयोज्यः । इन्द्रायुधादष्टमसाध्यम् । अत्र दष्टपदं दंशार्थे, अथ निर्विषाः— कपिला पिङ्गला, शङ्कुमुखी, मूषिका, पुण्डरीकमुखी, सावरिका चेति । तत्र, मनःशिलारञ्जिताभ्यामिव पार्श्वाभ्यां पृष्ठे स्निग्धा मुद्गवर्णा कपिला; किंचिद्रक्ता वृत्तकाया पिङ्गाऽऽशुगा च पिङ्गला; यकृद्वर्णा शीघ्रपायिनी दीर्घतीक्ष्णमुखी शङ्कुमुखी; मूषिकाकृतिवर्णाऽनिष्टगन्धा च मूषिका; मुद्गवर्णा पुण्डरीकतुल्यवक्त्रा पुण्डरीकमुखी; स्निग्धा पद्मपत्रवर्णाऽष्टादशाङ्गुलप्रमाणा सावरिका, सा च पश्वर्थे हस्त्यश्वादीनामर्थे । तासां क्षेत्राणि—यवनपाण्ड्यसह्यपौतनादीनि ( सुसू. १३.११–१३ ) तासां ग्रहणम् आर्द्रचर्मणा—तासां पोषणम्—एता नवे महति घटे सरस्तडागोदकपङ्कमावाप्य निदध्यात्; भक्ष्यार्थे चासामुपहरेच्छैवालं वल्लूरमौदकांश्च कन्दांश्चूर्णीकृत्य; शय्यार्थं तृणमौदकानि च पत्राणि; तासामवचारणं जलौकोवसेकसाध्यव्याधितमुपवेश्य संवेश्य वा, विरूक्ष्य चास्य तमवकाशं मृद्गोमयचूर्णैर्यद्यरुजः स्यात् । गृहीताश्च ताः सर्षपरजनीकल्कोदकप्रदिग्धगात्रीः सलिलसरकमध्ये मुहूर्तं स्थिता विगतक्लमा ज्ञात्वा ताभी रोगं ग्राहयेत् । श्लक्ष्णशुक्लार्द्रपिचुप्रोतावच्छन्नां कृत्वा मुखमपावृणुयात्; अगृह्णन्त्यै क्षीरबिन्दुं वा दद्यात्, शस्त्रपदानि वा कुर्वीत; यद्येवमपि न गृह्णीयात्तदाऽन्यां ग्राहयेत् । यदा च निविशतेऽश्वखुरवदाननं कृत्वोन्नम्य च स्कन्धं तदा जानीयाद्गृह्णातीति; गृह्णन्तीं चार्द्रवस्त्रावच्छन्नां कृत्वा धारयेत् । दंशे तोदकण्डुप्रादुर्भावैर्जानीयाच्छुद्धमियमादत्त इति; शुद्धमाददानामपनयेत्; अथ शोणितगन्धेन न मुञ्चेन्मुखमस्याः सैन्धवचूर्णेनावकिरेत् । पतितां तण्डुलकण्डनप्रदिग्धगात्रीं तैललवणाभ्यक्तमुखीं वामहस्ताङ्गुष्ठाङ्गुलिभ्यां शनैः शनैरनुलोममनुमार्जयेदामुखात्, वामयेत् तावद्यावत् सम्यग्वान्तलिङ्गानीति ( सुसू. १३.१७, १९–२२ ) जलौकाः पित्तदुष्टशोणितनिर्हरणार्थं सुखिनां रक्तस्रावार्थं योजयेत् ( अहसू. २६.३५ ) आ. को. म. ७६

**जळू. जलायुका**—जल ह्यांचे आयुष्य म्हणून जलायुका. जल ह्यांचे घर म्हणून जलौकस. प्रकार दोन. ६ सविष ६ निर्विष. नांवे व वर्णन वर आहे. **चिन्हे**—सविष चावल्याने दंशावर सूज फार खाज अंग गळणे ज्वर आग ओकारी माज मूर्च्छा. **उपचार**—महागद नांवाचा योग पिणे लेप व नाकात घालणे याकरिता.

**निर्विष जळवा**—कमळाच्या सर्वजाति व शेवाळ असलेल्या शुद्ध पुष्कळ पाण्यात होतात. त्या शेवाळासारख्या हिरवट काळसर वर रेषा असलेल्या गोल असतात. **त्यांचे ग्रहण**—ओल्या कातड्यानें करावे; नव्या मोठ्या मडक्यात ठेवाव्या. आत चांगला चिखल घालून **खाण्याकरिता**—शेवाळ शुष्कमांस व पाण्यातील कंदाचे चूर्ण ठेवावे. **झोपण्याकरिता**—गवत व पाण्यातल्या वनस्पतींची पाने ठेवावी. **जळवा लावणे**—रोग्याला बसवून किंवा निजवून ती जागा रूक्ष करावी; दुखरी नसेल तर माती किंवा शेणीचे चूर्ण लावून पुसावी. जळवांना मोहरी हळद पाण्यात कालवून चोपडून पाण्याच्या तसराळ्या मध्ये ४८-५० मिनिटे ठेवून त्यांचा थकवा गेला आहे असे दिसल्यावर चिकण पांढऱ्या ओल्या फडक्याने झाकून १।१ उचलावी व लावावी. ती लागत नसेल तर दूध किंवा रक्ताचा थेंब तेथे ठेवून लावावी किंवा सुई रक्ताचा थेंब बाहेर येईल अशी टोचावी व मग लावावी. इतके करूनही लागत नसेल तर दुसरी घ्यावी. खांदा उंच करून घोड्याच्या खुराप्रमाणे तोंड लावले आहे असे दिसले की ती रक्त चोखते असे समजावे. तिच्यावर ओले फडके झाकावे. खाज व टोचणी नाही तोपर्यंत अशुद्ध रक्त आणि ती सुरू झाली की शुद्ध रक्त ती चोखते आहे असे समजून सोडवावी. रक्ताच्या वासाने ती सोडत नसेल तर सैंधव चूर्ण किंवा हळद तिच्या तोंडावर टाकावी. पडलेल्या जळूला तांदुळाचा कोंडा लावून तेल व सैंधव तोंडाला लावून डाव्या हाताचा आंगठा व करंगळीने ती उलटी धरून हळू हळू शेपटाकडून तोंडापर्यंत क्रमाने दाब देऊन रक्त ओकवावे. पित्तदूषित व सुखी लोकांचे रक्त काढण्याकरिता जळवा लावाव्या.

**जलौकावचारणीय**—वि., अध्याय० ( सुसू. १३.१ ) अध्यायाचे नाव.

**जल्प**–पु., वादः पक्षाश्रितयोः संभाषणम् ( चवि. ८.२८ )
आपला पक्ष सिद्ध करणारे प्रतिपादन.

**जल्पक**–पु., वादी प्रतिवादी वा ( चवि. ८.१८ )
वादी किंवा प्रतिवादी.

**जल्पान्तर**–न., सामयिकसर्वार्थादिविशेषितो जल्पकविशेषः ( चक्र चवि. ८.१८ )
करावयाच्या चर्चेचे नियम किंवा उद्देश उभयपक्षी मान्य झाल्यावर प्रतिपक्षावर विजय मिळवण्यासाठी चालवावयाची चर्चा.

**जव**–पु., वेगः ( सुचि. २७.८ ) वेग.
वनस्पति० यवः ( रा. १६.१२५ ) जव.

**( जवा )**–स्त्री., वनस्पति० जपा ( रा. परि. १०.३९ )
तांबड्या फुलांची व सूर्योदयाला पूर्ण फुलणारी वनस्पती. जास्वंद.

**जवनिका**–स्त्री., पटलम् (असंसू. ३३.४) पडदा. कनात.

**जवनी**–स्त्री., वनस्पति० यवानी ( र. २६.५४–५५ )
ओवा.

**जवादि**–न., सुगंधिद्रव्य० तद्गुणाः–उष्णं, स्निग्धं, सौगन्धिकं, मोहनाह्लादकारकं, वातघ्नं ; नीलं जवादि संस्निग्धं; ईषत्पीतं जवादि सुगन्धदं; उभयमप्यातपे बहलामोदं, सर्वमपि राजसदृशानां योग्यम् जवादिकस्तुरी० ( रा. १२.६–८ )
**गुण**–एक सुगंधी द्रव्य. स्निग्ध उष्ण सुगंधी मोहून टाकणारे आल्हादकारक, वातनाशक, नील व किंचित् पिवळे असे दोन्ही जवादीचे प्रकार उन्हात अति आनंददायक राजासारख्या संपन्नांना योग्य.

**जवोपरोध**–पु., वेगस्योपरोधो विघातः ( चसू. २१.४ )
वेग आवरणे, वेग बंद करणे.

**जागत**–पु., वनस्पति० सोमवल्ली ( सुचि. २९.७ )
सोमवल्ली, महौषधि.

**जागर**–पु., जागरणम् ( अहृसू. २२.२६ ) जागरण.

**जागरण**–न., निद्राया अभावः ( चनि. १.३३ ) रात्रौ जागरणं रूक्षम् । कफमेदोरोगिणां विषपीडितानां च रात्रौ जागरणं हितकारकम् ( सुशा. ४.४८ ) अपथ्यमप्यभ्यासान्नोपघातकम् ( सुशा. ४.४१ )
जागरण, झोपेचा अभाव. रात्री जागरण करणे रूक्षता वाढविते. कफमेदाच्या रोग्यांना व विषाने पिडलेल्यांना रात्री जागरण हितकर. रात्री जागरण अपथ्यकर असले तरी अभ्यास ( नित्याची सवय ) असेल तर घातक नाही.

**जागरिष्णु**–वि., जागरणशीलः ( सुसू. ३३.२५ )
जागरणाची सवय असणारा. नेहमी जागरण करणारा.

**जागुड**–न., वनस्पति० कुङ्कुमम् ( रा. १२.२१ ) केशर.

**जाङ्गम**–वि., जङ्गमप्रभवम्, जङ्गमस्येदमिति वा जाङ्गमम्, मधुगोरसपित्तवसामज्जाऽसृगामिषविण्मूत्रचर्मरेतोऽस्थिस्नायुशृङ्गनखखुरकेशलोमरोचनादीनि जाङ्गमद्रव्याणि ( चसू. १.६८–६९ )
स्थलांतर करणाऱ्या प्राण्याचे द्रव्य. मध दूध पित्त चरबी मज्जा रक्त मांस स्नायु हाडे विष्ठा मूत्र शुक्र कातडी नख खुर शिंग केश लव गोरोचन इत्यादी द्रव्ये.

**जाङ्गल**–पु., वि., देश० अल्पोदकद्रुमः प्रवातः प्रचुरातपः स्वल्परोगतमो देशः ( चवि. ३.४७ ) आकाशसमः प्रविरलाल्पकण्टकिवृक्षप्रायोऽल्पवर्षप्रस्रवणोदपानोदकप्राय उष्णदारुणवातः प्रविरलाल्पशैलः स्थिरकृशशरीरमनुष्यप्रायो वातपित्तरोगभूयिष्ठश्च ( सुसू. ३५.४२ ) क्लेशसहारोगशरीरदीर्घायुप्रायजनपदोऽयं कटुकरसयोनिः ( असंसू. १८.३० )
थोडी झाडे व पाणी असणारा प्रदेश. वारा व ऊन फार, व रोग फार कमी, आकाशासारखा खूप विरल, थोडी काटेरी झाडे असलेला, थोडा पाऊस थोडे झरे तळी व थोड्या पाण्याचा उष्ण रूक्ष वारा अगदी विरल व लहान टेकड्या असलेला स्थिर किडकिडीत शरीराच्या माणसांचा वातपित्तभूयिष्ठ देश. यात तिखट रस आधिक्याने असतो. क्लेश सहन करणारा निरोगी दीर्घायुषी लोक असलेला हा प्रदेश.

**–तैल**–न., तद्गुणः–कफजगुल्मेऽनुवासनार्थं हितकरम् ( सुउ. ४२.२३ )
रूक्ष प्रदेशातील बियांचे तेल. कफज गुल्मात बस्तीकरिता हितकर.

**–पल**–न., जाङ्गलमांसम् ( अहृसू. ३.३० )
रूक्ष प्रदेशातील प्राण्यांचे मांस.

**–मांस**–न., जाङ्गलप्राणिनां मांसम्, तद्गुणाः–रसे कषायमधुरं, शीतवीर्यं, लघु, विशदं, रुच्यं, मांसानां चोत्तमम्, यस्मिन् सन्निपाते पित्तमधिकं वातो मध्यः कफश्च स्वल्पस्तत्र जाङ्गलं मांसं हितकारकम् ( असंसू. ७.८७–८८ )
रूक्ष प्रदेशातील प्राण्यांचे **मांस–गुण**–तुरट व गोड थंड हलके बुळबुळीतपणा नाहीसे करणारे रुचकर सर्व मांसात उत्तम. ज्या सन्निपातात पित्त अधिक वात मध्यम व कफ थोडा त्यात हे हितकर.

**–रस**–पु., **जङ्गालविष्किरमांसरसो गुल्मिनां पाने हितः** ( सुउ. ४२.५३–५४ )
जाड मांडीच्या–हरिण इ० व उकरून भक्ष्य मिळविणाऱ्या कोंबडा इ० चा मांस रस गुल्मी रोग्यास हितकर.

**–वर्ग**–पु., **मांसवर्गाणां षण्णामेकतमः स चाष्टविधः– जङ्गालाः, विष्किराः, प्रतुदाः, गुहाशयाः, प्रसहाः, पर्णमृगाः, बिलेशयाः, ग्राम्याश्चेति । तेषां जङ्गालविष्किरौ प्रधानतमौ** ( सुसू. ४६.५३ )
मांसवर्गापैकी रूक्ष प्रदेशातील प्राणी ते आठ प्रकारचे ( वर पहा ). हरिण इ० व कोंबडा. इ० सर्व श्रेष्ठ.

**–वसा**–स्त्री., **जाङ्गलप्राणिनां वसा** ( सुउ. ४२.२३ )
रूक्ष प्रदेशातील प्राण्यांची चरबी.

**–वैहङ्ग**–वि., परिव० **जाङ्गलविहङ्गा लावादयस्तेषां मांसरसो जङ्गलवैहङ्गपदाभिधेयः शूले भोजनार्थम् उपयुज्यते** ( सुउ. ४२.९१ )
रूक्ष प्रदेशातील लावा इ० पक्षी–मांसरस शूलावर चांगला.

**जाठराग्नि**–( परिव० ) पु., **अग्नि० जठरेऽन्नस्य पक्ता, जाठरो भगवानीश्वरोऽन्नस्य पाचको रसानाददानः सौक्ष्म्याद् विवेक्तुं नैव शक्यते** ( सुसू. ३५.२७ )
अन्नपाचक अग्नि. रस भक्षण करणारा हा अग्नि सूक्ष्म असल्याने तो वेगळा करणे शक्य नसते.

**जाड्य**–न., **लक्षण० गौरवम्** ( असंसू. ३२.१९ )
जडपणा.
**अपटुता** ( ड. सूचि. ३८.९ )
मरगळणे, तरतरी नसणे.
**स्तब्धता** ( सुचि. २४.१४ ) स्तब्धता.

**जाड्यारि**–पु., **वनस्पति० जम्बीरः** ( रा. ११.१८ )
मोठा निंबु, ईडनिंबु.

**जाण्डक**–पु., **प्राणि० मरुदेशोद्भवः प्राणी, पृष्ठमात्रे संकोचमुपयाति । अस्य रोमाणि हिक्काश्वासकासरोगोपयुक्तानि** ( चचि. १७.११८ )
बरड देशातला वा निर्जल देशातला प्राणी. त्याला शिवताच तो संकुचित होतो. याचे केश उचकी श्वास व खोकला या रोगावर उपयुक्त.

**जात**–वि., **उत्पन्नः** ( चशा. ८.४६ ) उत्पन्न झालेला.

**–कर्म**–न., **जातमात्रस्य वेदोक्तं कर्म** ( चशा. ८.४६ ) **नालकर्तनादिकं कर्म** ( काखिल. १२.३ )
जन्मताच करावयाचे वेदोक्त कर्म. नाळ कापणे इत्यादी कर्म.

**–कर्मोत्तर**–वि., अध्याय० **जातकर्मानन्तरं विषयप्रतिपादकः अध्यायः** ( का. खिल. १२.१ )
अध्यायाचे नाव. जातकर्मानंतर करावयाच्या कृत्यासंबंधी अध्याय.

**–घ्नी**–स्त्री., **योनिरोग० रौक्ष्यादनिलः कुपितो जायते तेन दुष्टार्तवं भवति तद्दुष्टार्तवाज्जातं सुतं जातमात्रं हन्ति** ( अहउ. ३३.३४ )
योनीचा एक रोग. रूक्ष पदार्थांच्या सेवनाने वात प्रकुपित होऊन आर्तव दुष्ट होते, त्यामुळे मूल जन्मताच मरते.

**–दशन**–वि., **लक्षण० उद्भूतदन्तः** ( असंउ. १ )
जन्मतःच दांत असलेला.

**–प्राण**–वि., **लक्षण० जातबलः** ( सुचि. ९.४१ )
जगण्याची शक्ति–जीवनशक्ति मिळालेला. बल उत्पन्न झालेला.

**–मद**–वि., **जातो मदो यस्मिन्नसौ वसन्तादिः ( कालः )** ( चचि., २.३–३० )
सृष्टिसौंदर्य उत्पन्न झालेला काल, वसंत इ० काल. आनंद देणारा काळ.

**–मात्र**–वि., **सद्योजातः, तस्यौषधस्य प्रमाणं विडङ्गफलमात्रम्** ( का. लेहाध्याय )
नुकताच जन्मलेला. जन्मतः त्याला वावडिंगाएवढेच औषध द्यावे.

**–रस**–वि., **व्यक्ताम्लम्, मधुगन्धम्** (सुसू. ४४.४४)
रस उत्पन्न झालेले, रस व्यक्त झालेले, अम्लरस व्यक्त झालेले, मधुरगंध.

**–रूप–न., खनिज० सुवर्णम्** ( चचि. २.३–११ )
सुवर्ण.

**–वेग**–वि., **उद्वेगोऽतिवेगो वा उदग्रो वेगो यस्य, स उद्वेगः, अतिशयितो वेगो यस्यासौ अतिवेगः** ( चक्र. चचि. २८.४८ )
ऊर्ध्वगति. ऊर्ध्व दिशेचा वेग. अतिशय वेग.

**–वेदस्**–पु., **अग्निः** ( सुउ. १८.८६ ) अग्नि, विस्तव.

**–शर्कर**–वि., **जातं शर्कराचूर्णं यस्मिंस्तादृशो (दन्तः)** ( चइ. ३.६ )
ज्या दातावर रेव जमली आहे असा.

**–सत्व**–वि., **जातकृमिः** ( सुचि. ९.५१ )
कृमि झालेला, जंत असलेला.

**–हारिणी**–स्त्री., देवता० **नारीणां बालानां च ग्रहः,** ( काक. रेवती ) **रेवतीग्रहस्य स्वरूपम्–इयं देवता पुष्पं हन्ति, वपुर्हन्ति, गर्भांश्च हन्ति, जातांश्च**

हन्ति, जायमानांश्च, जनिष्यमाणांश्च हन्ति, तस्मात् जातहारिणीति संज्ञिता ( कारेवतीकल्प. ७ ) सा त्रिविधा–साध्या, याप्याऽसाध्या च पुनश्च लोकभेदतः सा दैवी, मानुषी, तिरश्चीनेति त्रिविधा ( कारेव. ६२ ) तत्र मानुषी जातहारिणी रजस्वलां, गर्भिणीं प्रसूतां कुटीगतां वा स्त्रियं क्रुद्धा रेवती त्रिषु कालेष्वाविशते । अधर्मम् ऋते जातहारिणी नारीं न विशते । वर्णां वर्णान्तरां, लिङ्गिनीं कारुकीमिति चतुर्विधाः स्त्रिय आविश्य जातहारिणी स्त्रियं प्रविशति । यां स्त्रियम् आविश्य जातहारिणी अन्यां नारीं प्रविशति तत्र प्रथमाविष्टाया वर्णादिनामधेयं जातहारिणीं प्राप्नोति ( कारेक. ६८ )

सामान्या चिकित्सा–यां स्त्रियमाश्रित्य ऋतुमतीं नारीं जातहारिणी प्रविशति सा स्त्री एनाम् ऋतुमतीमवसिञ्चेत् । स्वेन भागधेयेन एनां प्रजावतीं करोति । बालके जातहारिणी–लक्षणानि–उच्चैर्भृशं रोदनं, स्तन्यबाधा, ज्वरः, तन्द्रा, प्रमीलकः, शिरोभितापो, वैवर्ण्यं, पाण्डुपीतता, तृष्णा, अतिसारस्तालुशोषः, प्रहर्षणं, मुखपाको, मुखस्फोटो, विसर्पः, कामला, श्वासः, कासः, क्षुतिः, क्षणात् शीतीभवनं, मृतप्रायत्वम्, निश्चेष्टता, स्तन्यद्वेषो, मृदुना रोगेणापि दारुणपीडानुभवः ( कारेक. ७२–७८ )

जन्मतःच प्राण हरण करणारी मारणारी देवता. रेवती ग्रह. ही गर्भाला, जन्मतः मुलाला, जन्मणाऱ्याला जन्म देणारीला ही मारते. प्रकार. ३ वर आहेत. **बाधा झाल्याची लक्षणे**–मोठ्याने फार रडणे दूध पचत नाही ताप झापड तंद्रा डोळे तापणे वर्ण बिघडणे पांडुता पिवळटपणा तहान अतिसार टाळूचा शोष तोंड येणे तोंडावर फोड धावरे कावीळ श्वास खोकला शिंका एकदम थंड होणे मृतप्राय निश्चेष्ट होणे स्तनपानाचा तिटकारा रोग हलका पण पीडा फार.

**जातारिष्ट**–वि., **यस्यारिष्टानि मृत्युपुरःसराणि लक्षणानि संजातानि सः** ( चनि. ६.१६ )
मरणसूचक चिन्हे दिसू लागलेला ( रोगी ). मरणार असे दिसत असलेला.

**जाति**–( परिव. ) स्त्री., **जन्मकारणम्** ( चशा. ८.१ )
जन्माचे–उत्पत्तीचे कारण.
**जन्म**, ( चशा. ३.१३ ) जन्म, उत्पत्ति.
**संप्राप्तिः** ( चनि. १.११ )
दोष कसे कोठे दुष्ट झाले, शरिरात कसे पसरले व रोग कोठे कसा उत्पन्न केला हे ज्ञान. रोगनिर्मितीचे ज्ञान
**वनस्पति० जाती** ( र. १७.५२–५३ ) जाई.

**–कोश**–पु., **वनस्पति० जातिपत्री** ( ध. ३.३३ )
जायपत्री.
**जातीफलम्** ( चचि. २६.२१० ) जायफळ.

**–( कोशा )**–स्त्री., **वनस्पति० जातिपत्री** ( ध. ३.३३ ) जायपत्री.

**–कोशक**–पु., **जातिकलिका** ( असंचि. २३ )
जाईची कळी.

**–कोषक**–पु., **वनस्पति० जातीफलम्** ( चचि. २८.१५२ ) जायफळ.

**–पत्री**–स्त्री., **वनस्पति० कटुः, उष्णा, वर्ण्या, लघुः कायशान्तिदा, वक्त्रदुर्गन्धहारिणी, कफघ्नी विषघ्नी** ( सुसू. ४६.२०२–३ ध. ३.३३ )
हिं.—जावित्री.
**म.—जायपत्री.**
गु.—जावंत्री.
ता.—जाथीकै.
फा.—जवित्री.
जायपत्री तिखट उष्ण हलकी वर्ण चांगला करणारी शरिराला शांती देणारी तोंडाचा दुर्गंध नाशक कफ व विष नाशक.

**–प्रवाल**–पु., **वनस्पति० जात्याः पल्लवानि** ( असंसू. १५.१८ ) जाईची पाने.

**–फल**–न., **वनस्पति० जातीफलम्** ( र. १७-३९-४० ) जायफळ.

**–शृङ्ग**–न., **वनस्पति० जातीफलम्** ( ध. ३.३५ )
जायफळ.

**–सस्य**–न., **वनस्पति० जातीफलम्** ( ध. ३.३५ )
जायफळ.

**–सात्म्य**–न., **मनुष्यजातेरनुकूलम्, यथा शाल्यादयः, मृगपक्षिजातीनां च तृणपतङ्गादीनि** ( सुसू. ३५.३९ )
मनुष्य जातीला आत्मसात् होणारे. जसे तांदूळ गहू दूध. हरिणादि पशु पक्षी जातींना गवत पतंग इत्यादी.

**–सार**–न., **वनस्पति० जातीफलम्** ( रा. १२.६७ )
जायफळ.

**–सूत्रीय**–वि., अध्याय० ( चशा. ८.१ काशा. १ )
अध्यायाचे नाव.

**–स्मर**–वि., यः पूर्वां जातिं जन्मकुलविशेषं वा सम्भूतिं स्मरति सः ( चशा. ३.१३ )
पूर्वजन्म जात कुल इत्यादि स्मरतो तो.

**जाती**–स्त्री., वनस्पति० तिक्ता, शीता, कफपित्तजित्, मुखपाकव्रणकुष्ठघ्नी, कलिकागुणाः,–चक्षुष्या, व्रणविस्फोटकुष्टनुत्; पुष्पगुणाः–सुगन्धि, सर्वश्रेष्ठं मनोज्ञं वातकफजित् सुकुमारम् ( ध. १३७-८ ) ( रा. १०. २३१-३ ) कषायतिक्तोष्णा शिरोमुखदन्तार्तिविषकुष्ठरक्तस्रावनाशिनी ( र. १७. ५२-३ )
हिं.—जाती. जाई.
**म.—जाई मालती.**
बं.—जाती.
जाई. कडु तुरट थंड कफ पित्त जिंकणारी तोंड येणे व्रण कुष्ठनाशक. शिर दांत यातील शूळ विष रक्तस्रावनाशक **कळी**–डोळ्याला हितकर व्रण फोड कुष्ठ नाशक. **फूल**–सुकुमार सुगंधी सर्वात श्रेष्ठ मनाला आवडणारे वातकफनाशक.
जातीफलम् ( चसू. ५.७७ ) जायफळ.
**आमलकी** ( चक्र. चचि. ७.७० ) आवळकाठी.

**–कोश**–पु., वनस्पति० जातिपत्री
( सुसू. ४६.२०२ ) जायपत्री.

**–पल्लव**–पु., मालतीपत्राणि अस्य कल्कः अर्बुदेषु व्रणशोधनायोपयुज्यते ( असंउ. ३५. )
जाईची पाने यांची चटणी अर्बुदांचा व्रण शुद्ध करण्यास योजतात.

**–प्रवाल**–पु., मालतीपत्रम् कुष्ठघ्नवर्गीयमेकं द्रव्यम्
( चसू. ४.११ ) जाईचे पान.

**–फल**–न., वनस्पति० तिक्तं, कटु, लघु, कफघ्नं, वक्त्रक्लेददौर्गन्ध्यतृष्णाघ्नम् ( सुसू. ४६.२०२–३ ) कषायं, उष्णं, दीपनं, ग्राहि, वृष्यं, वातघ्नं, प्रमेहातिसारकण्ठरोगघ्नम् ( ध. ३.३५ )
हिं.—जायफळ.
**म.—जायफळ.**
गु.—जायफळ.
बं.—जायफळ.
ता.—जथिकै.
**जायफळ**–कडु तुरट तिखट हलके उष्ण अग्निदीपक मळ घट्ट करणारे शुक्रधातूस हितकर कफवात नाशक. तोंडाचा स्राव गळ्याचे रोग दुर्गंधी तहान प्रमेह अतिसार नाशक.

**–फलरस**–न., वनस्पति० आमलकी ( ध. १.२१५ )
आवळा.

**–फला**–स्त्री., वनस्पति० आमलकी ( रा. १७.३२३ )
आवळकठी.

**–रस**–पु., भैषज्य० बोलः ( अहृसू. १५.४३ ) बोळ.

**जातीका**–स्त्री , वनस्पति० जाती (असंचि. २३ ) जाई.

**जातुक**–न., वनस्पति० शालिपर्णी शुक्ला शालिपर्णी
( सुसू. ४६.२७४ ) सालवण–पांढरी.

**( जातुका )**–स्त्री., वनस्पति० शालिपर्णी ( असंसू. ७. )
सालवण.

**–शाक**–न., शाक० वंशपत्रिका
( चक्र. चसू. २६.८४ ) एक भाजी.
**पौष्करशाकम्** ( सुसू. २०.१३ ) कमळाची भाजी.

**जातुष**–वि., जतुनो विकारो जातुषम् इति । लाक्षामयम्
( सुसू. २७.१७ ) लाखेचे, लाखमय.

**जातोदक**–वि., लक्षण० जातमुदकं यस्मिन् तत्
( चचि. १३.५१ ) द्र० **उदर**
ज्याच्या पोटात पाणी झाले आहे असा उदर रोगी.

**जात्यन्ध**–वि., जन्मान्धः ( सुशा. २.३५ ) जन्मांध.

**जात्यादिकुसुमाष्टक**–न., वनस्पति० जातीयूथीराजवल्लीचम्पकप्रभृतीनां पुष्पाणामष्टकम्
( र. १९. ३९ )
जाईजुई इत्यादि फुलांचे अष्टक.

**जात्यादिघृत**–( परिव. ) न., घृत० मर्मजव्रणनाडीव्रणनाशकम् ( र. २४.१०२–४ )
जाई इत्यादी द्रव्यांचे तूप. मर्मावरील व्रण. नाडीव्रणनाशक.

**जानु**–शारीर० जङ्घोरुसंधिः ( चवि. ८.११७ )
**मर्म०** ( असंशा. ७.४ )
गुडघा, मांडी व पिंडरीचा संधी.

**–कपालिक**–न., अस्थि० ( चशा. ७.६ ) एक हाड.

**( कपालिका )**–स्त्री., अस्थि० जानुकपालिकम्
( चशा. ७.६ ) गुडघ्याची वाटी.

**–तुल्यासन**–न., जानुप्रमाणोत्सेधं पीठम्
( अहृसू. १८.२० ) गुडघ्या इतके उंच आसन.

**–भेद**–पु., रोग० जान्वोर्भेदवद्वेदना, अशीतिवातविकारेष्वेकः ( चसू. २०.११ )
गुडघ्याला फूट लागल्यासारखी वेदना. ऐशी वातविकारांपैकी एक.

**–मर्म**–न., मर्म० जानुसन्धिस्थाने ( सुशा. ६.२४ )
**सक्थिमर्म** (सुशा. ६.६) **सन्धिमर्म** ( सुशा. ६.७ )
**वैकल्यकरमर्म** ( सुशा. ६.१२–१३ ) **जानुमर्म**-

**संख्या–द्वे–वामदक्षिणभेदेन मानं–त्र्यङ्गुलम्** ( सुशा. ६.२८ ) **तत्र विद्धस्य लक्षणम्–खञ्जता** ( सुशा. ६.२४ )

गुडघा मर्म. गुडघ्याच्या सांध्यातले खालच्या शाखेतले मर्म. जातसंधिमर्म. विकलताकारक. संख्या–दोन, डावे, उजवे. प्रमाण–तीन अंगुळे. तेथे जोराच्या आघाताने लंगडेपणा येतो.

**–विश्लेष**–पु., **रोग० जानुनः विश्लेषः अशीतिवातविकारेष्वेकः** ( चसू. २०.११ )

गुडघा निखळणे. ऐशी वाताविकारांपैकी एक.

**–शूल**–पु., **लक्षण० जानुनः शूलः** ( चसि. २.१६ )

गुडघ्यातील शूळ.

**–शोष**–पु., **लक्षण० जानुनः शोषः** (च. सि. २.१६ )

गुडघा सुकणे-बारीक होणे.

**–संग्रह**–पु., **लक्षण० जानुनः संग्रहणम् एकत आकुञ्चनम्** ( चसू., १४.२३ )

गुडघा जखडणे. गुडघा धरणे.

**–स्तम्भ**–पु., **लक्षण० जानुनः स्तम्भः** (चसि. २.१६)

गुडघा ताठरणे.

**जान्वर्ति**–स्त्री., **लक्षण० जानुशूलम्** ( चसू. १४.२३ )

गुडघ्यातला शूळ.

**जान्वस्थि**–न., **अस्थि० जानुनोऽस्थि** ( सुशा. ५.१९ )

गुडघ्याचे हाड.

**जाम्बव**–वि., **जम्बूवृक्षभवं जम्बूसंबद्धं वा** ( अहसू. ६.१२७ )

जांभळाच्या झाडाचे फळ साल मूळ इत्यादी.

न., **वनस्पति० जम्बूफलम्** ( चसू., २५.४० )

जांभूळ, जांभळाचे फळ.

**खनिज० सुवर्ण** ( रा. १३.३ ) सोने.

**( जाम्बवी )**–स्त्री., **वनस्पति० जम्बू** ( रापरि. २४ )

जांभूळ.

**–वदन**–न., **यन्त्र० जम्बूफलमुखाकारं शलाकायन्त्रम्** ( सुसू. ७.१४ )

जांभळाच्या आकाराचे तोंड असलेली सळई, किंवा वात.

**जाम्बवती**–स्त्री., **वनस्पति० जम्बूः** ( रापरि. ५.२४ )

जांभूळ.

**जाम्बवाभास**–वि., **लक्षण० जम्बूफलसदृशः, जाम्बवाभासौ ओष्ठौ यस्य, तस्य दुर्लभं जीवितम्** ( सुसू. ३१.५ )

जांभळाच्या फळासारखे. जांभळासारखे ओठ असलेला, तो जगणे कठीण.

**जाम्बवास्थि**–न., **जम्बूफलान्तर्गतबीजम्** ( सुनि. १४.६ )

जांभळाच्या फळात असलेली बी. आठळी.

**जाम्बवोष्ठ**–न., **यन्त्र०** ( असंउ. ४४ ) **जम्ब्वोष्ठम्, जाम्बवौष्ठम्** पहा 'जांबववदन'

**जाम्बवौष्ठ**–न., **यन्त्र०** ( सुसू. ५.६ ) **जम्बूफलसदृशमुखाग्रा कृष्णपाषाणरचिता वर्तिः**

काळ्या पाषाणाची केलेली जांभळाच्या फळाच्या आकाराचे आरंभीचे टोक असलेली वात.

**जाम्बूनद**–न., **खनिज० सुवर्णम्** ( ध. ६.१ ) सोने.

**जायमान**– वि., **उत्पद्यमानः** ( चशा. ४.३ )

उत्पन्न होणारे.

**जारक**–पु., **कीट० वायव्यजातीयः सविषः कीटः** ( असंउ. ४३ )

वातप्रकोपक-वातप्रकृतीचा विषारी किडा.

**जारण**–पु., **वनस्पति० कासमर्दः** ( रा. ४.१७७ )

कासविंदा.

न., **गालनपातनव्यतिरेकेण घनहेमादिग्रासपूर्वकं पूर्वावस्थाप्रतिपन्नत्वम्** ( र. ३.११ )

पाऱ्याला अभ्रक सोने यांचा घास दिल्यानंतर पारा गाळून किंवा त्यावर पातनसंस्कार न करतांही सोने अभ्रक हे त्यात घालण्यापूर्वी तो जशा अवस्थेत असतो तशी अवस्था प्राप्त करणारा संस्कार.

**( जारणा )**–स्त्री., **पारदेऽनन्तदृढसम्बन्धेनैकीभावः;** ( र. ८.७२ ) **सा द्विविधा, समुखा निर्मुखा च, मुखवतः पारदस्य कठिनानां लोहानां भक्षणे सामर्थ्यमिति समुखा; पारदे बीजस्य चतुर्थांशभागाऽऽदानेन नाम ग्रसनेन जायमाना निर्मुखा** ( र. ८.७२–७७ )

पाऱ्यात घातलेल्या अभ्रक सोने यांचे एकीकरण अगदी दृढ होणे. एकरूप करणारा संस्कार. दोन प्रकार १ समुख २ निर्मुख. मुखवान पारा कठीण धातु पचवण्याला समर्थ होतो ही समुखा. पाऱ्यात एक चतुर्थांश अभ्रक इ० घालून करावयाची जारणा निर्मुखा.

**( जारणा )–यन्त्र**–न., **यन्त्र० द्वादशाङ्गुलदीर्घलोहमूषाच्छिद्रमय्यामेकस्यां गन्धकं विलिप्यान्यस्यां मूषायां पारदं निदध्यात्। उभयोरुत्तानयोरेवं सन्धिं विलिप्योर्ध्वाधोऽग्निं प्रज्वालयेद्येन द्रुतो गन्धकच्छिद्रद्वारोपरितनमूषायाऽधःस्थितपारदे पतति** ( र. २०.२३ )

**( जारणी )**–स्त्री., **वनस्पति० स्थूलजीरकम्, पृथ्वीका** ( रा. ६.९१ ) बाफळी. मोठे जिरे.

**जारणायंत्र**–बारा अंगुळे लांब अशा दोन मुशी कराव्या, त्यांत एक बारीक छिद्रे असलेली असावी, तिच्यात गंधक व दुसरीत पारा घालून, गंधकाची मूस पाऱ्याच्या मुशीत घालावी; संधिलेप करून खालच्या मुशीच्या खाली पाणी असावे, अशा ठेवून खाली व वर अग्नि करावा. त्यामुळे वरचा गंधक पातळ होऊन खाली पाऱ्यात पडून तो त्यात जिरेल.

**जारद्गव**–वि., **वृद्धगोभवः जरद्गवो वृद्धवृषभः, तच्चर्मनिर्वृत्तो 'जारद्गव' इति** ( चक्र. चसि. ३.१० ) म्हातार्‍या गाईपासून झालेला.

**जाल**–न., **नेत्ररोग० लक्षण० नेत्रशुक्लभागगतजालाभः सन्तानः, सिराजालम्** ( सुउ. ४.८ ) डोळ्याच्या पांढऱ्या कवडीवर शिरांचे जाळे होते तो रोग.

**शारीर० सूत्रादिकृतरचना०** ( सुशा. ५.१२ ) **तस्य संख्या–षोडश जालानि, मांससिरास्नाय्वस्थिजालानि प्रत्येकं चत्वारि तानि मणिबन्धगुल्फसंश्रितानि परस्परनिबद्धानि परस्परगवाक्षितानि चेति; यैर्गवाक्षितमिदं शरीरम्** ( सुशा. ५.१२ ) शिरा स्नायु इत्यादींनी झालेले रचलेले जाळे. संख्या–सोळा जाळी. मांस सिरा स्नायु हाडे यांची प्रत्येकी चार जाळी, ती मनगट व घोटा यात परस्पर गुंतलेली व परस्परांनी छिद्रे केलेली, ज्यांमुळे शरीर जाळीदार आहे.

**–क्षीर**–न., **क्षीरविष० स्थावरविषभेदः** ( सुक. २.५ ) विषारी वनस्पती दूध. वनस्पती विष.

**–गर्दभ**–पु., **क्षुद्ररोग० पित्तोल्बणैर्दोषैर्विसर्पणशीलो दाहज्वरकरः शोथो जायते** (सुनि. १३.१४) **सुतीव्रो रक्तपाकयुक्तः शोफः** ( चचि. १२.९९ ) **तस्य चिकित्सा पित्तजस्य विसर्पस्य क्रियया साधयेत् मधुरौषधसिद्धेन घृतेन रोपयेत्** ( सुचि. २०.७–८ )

**हलका रोग**–पित्ताधिक दोषांनी पसरणारी दाह ज्वर करणारी सूज. अतितीव्र रक्ताची पचन युक्त सूज. **उपचार**–पित्त विसर्पांचे. गोड औषधांनी सिद्ध तुपाने रोपण करावे.

**–धरा**–स्त्री., **सिरा० जालानीव जालानि मांससिरास्नाय्वस्थिसन्धिजानि कूर्चशिरोव्यापीनि, तानि धारयन्ति यास्ताः** (ड. सुशा. ७.२२ ) जाळी धारण करणाऱ्या सिरा; मांस सिरा स्नायु हाडे संधि यात झालेल्या, कूर्चांच्या डोक्याचा भाग व्यापणाऱ्या शिरा.

**–बर्बुर**–पु., **वनस्पति० कषायः, उष्णः, रूक्षः, वातकफहृत्, दाहपित्तकृत्, वातामयविनाशकः** ( रापरि. ८.१४ )

**बाभूळ.** तुरट उष्ण रूक्ष कफकर दाह पित्तकर वातविकार नाशक.

**–मालिनी**–स्त्री., **वनस्पति० देवताडकः** ( चक्र. ) **देवदाली** ( चचि. २३.२०६–७ ) देवताड तृण. देवडांगरी.

**जालक**–न., **जन्तुलालाविरचितजालकाकारं मण्डलम्** ( सुउ. ७.८ ) जाळे ( कोळ्याचे ). जंतूंनी आपल्या लाळेच्या तंतूंनी केलेले जाळे.

**कन्दविष०** ( असंउ. ४० ) **द्र० 'विष'** विषारीकंद.

**–गर्दभ**–पु., **रोग० जालगर्दभः** ( चचि. १२.९९ ) या नावाचा विकार.

**जालाख्यरोग**–परिव० पु., **नेत्ररोग० महान् सरक्तो जालाभः कठिनसिरः** ( **मा. नेत्र;** ) पहा 'जाल'

**जालावतत**–वि., **जालव्याप्तम्** ( चचि. २१.३४ ) जाळ्याने व्यापलेले.

**जालाश्मगर्दभ**–पु., **क्षुद्ररोग० जालगर्दभः** ( र. २५.२ ) या नांवाचा रोग.

**जालिक**–वि., **सूक्ष्मानेकच्छिद्रः** ( चसि. ५.६–७ ) सूक्ष्म अनेक छिद्रे असलेला.

**जालिनी**–स्त्री., **रोग० प्रमेहपीडकाभेदः, सिराजालवती, स्निग्धस्रावा, महाशयार्तितोदा, सूक्ष्मच्छिद्रेति तल्लक्षणानि** ( चसू. १७.८३ ) प्रमेहात उपद्रव म्हणून झालेली पुळी. शिरांचे जाळे असलेली. स्राव स्निग्ध तिचे मूळ विस्तृत पीडा टोचणी सूक्ष्मच्छिद्रे असलेली.

**बालपीडका० कफप्राया, सिराजालतनुच्छिद्रवती** ( काचि. द्विव्रणीय ) लहान मुलांना होणारी पुळी. कफभूयिष्ठ. सिरांचे जाळे व बारीक छिद्रांनी युक्त.

**वनस्पति० देवदाली** ( र. ५.१५० ) देवडांगरी.

**कोशातकी** ( सुक. ७.१५ ध. १.१९२ ) दोडकी.

**क्षीरविष०** ( असंउ. ४० ) **'विष'** दुधाळ वनस्पती विष.

लूता० दंशलक्षणानि-तीव्रशोथो रुजा स्तम्भः श्वासस्तमोवृद्धिस्तालुशोषो दंशोऽवदीर्यते भिद्यते इति ( सुक. ८.१२४ )
एक विषारी किडा. दंशाने तीव्र सूज वेदना अंग जखडणे श्वास अंधेरी टाळू सुकणे व दंशाची जखम फाटते फुटते.

**जाविताह्वय**–न., वनस्पति० जलमुस्तम् ( ध. १.४३ ) पाणमोथा.

**जाहक**–पु., प्राणि० अयं बिलेशयवर्गे डल्हणेन निर्दिष्टः ( सुसू. ४६.७८ ) बिळात रहाणारा प्राणी.

**जिघांसु**–( वि., ) हन्तुम् इच्छुः, हननेच्छावान् इत्यर्थः ( सुउ. ५४.२० ) ठार मारू इच्छिणारा.

**जिघृक्षा**–( परिव. ) स्त्री., ग्रहीतुमिच्छा, ग्रहणेच्छा ( असंशा. १० ) घेण्याची इच्छा.

**जिङ्गिणी**–स्त्री., वनस्पति० मधुरा, कटुपाका, योनिशोधनी, वातघ्नी, व्रणातीसारघ्नी ( ध. ३.२२ )
हिं.—जिङ्गिनी, काश्मल.
**म.—मोई, मुया.**
गु.—मवेडी.
बं.—जिओल.
ता.—ओतियमर.
गुलटुणी, काळी सावरी, मोईमुया. ही गोड पचनानंतर तिखट वातघ्न योनि शुद्ध करणारी व्रणातीसारनाशक.

**जिङ्गिनी**–स्त्री., वनस्पति० जिङ्गिणी ( ध. ३,२२ ) ( सुसू. ३८.१४ चचि. ३०.८३ )
पहा ' जिङ्गिणी '.

**जिङ्गी**–स्त्री., वनस्पति० मञ्जिष्ठा ( ध. १.१८ ) मंजिष्ठ.

**जिजीविषु**–वि., जीवितुमिच्छुः ( सुउ. ५५.३ )
जगण्याची इच्छा असणारा, जगू इच्छिणारा.

**जिज्ञासा**–स्त्री., परीक्षा ( चवि. ८.४६ )
ज्ञातुमिच्छा ( सुसू. १४.३ ) जाणण्याची इच्छा.

**जिञ्झिरा**–स्त्री., वनस्पति० झिञ्झिरीटा (रापरि. ४.५३)
पिवळ्या फुलाची काटेरी गोल फळाची वनस्पती.

**जितहस्त**–वि., चिकित्सायां यशस्वी भिषक् जितः सुष्ठु सम्पादितो हस्तो नाडीस्पर्शादिः भेषजप्रयोगश्च येन सः, कारणे कार्योपचाराद्धस्तो नाडीस्पर्शभेषजप्रयोगादिवाचकः ( चवि. ८.४ )
कार्य जिंकणारा हात. उपचारात यशस्वी वैद्य.

**जितात्मा**–वि., जितेन्द्रियः ( चसू. २९.७ )
आत्मसंयमी. मन ताब्यात असणारा.

**जितेन्द्रिय**–वि., इन्द्रियजेता वशीकृतेन्द्रियवर्गः ( अहसू. ४.२४ ) इंद्रियांवर ताबा असणारा.

**जितेन्द्रियाह्व**–पु., वनस्पति० कामवृद्धिः (रापरि. ४.५१) विषयवासना वाढविणारी वनस्पती.

**जिह्म**–न., वनस्पति० तगरं ( ध. ३.५३ ) तगर.

**( जिह्मा )**–स्त्री., कुटिला ( चचि. २८.४१ )
नागमोडी, वेडीवाकडी.

**–भ्रू**–वि., वक्रभ्रूः ( सु. उ. ६१.९ )
वाकडी भुवई ज्याची तो. रागावलेला.

**–शल्य**–पु., वनस्पति० खदिरः ( ध. १.२५ ) खैर.

**जिह्माक्ष**–वि., लक्षण० वक्रलोचनः ( सुउ. ६०.९ )
वाकड्या डोळ्यांचा. तिरवा. तिरका.

**जिह्मीकरण**–न., परिव० लक्षण० नासिकाया वक्रीकरणम् इदं रिष्टलक्षणम् ( चइं. १०.५ )
नाक वाकडे करणे होणे. मरणसूचक चिन्ह.

**जिह्वक**–पु., रोग० सन्निपातज्वरभेदः, तस्य लक्षणानि श्वासः, कासः, परितापविह्वलता, कठिनकण्टकयुक्तजिह्वता, बधिरत्वं, मूकत्वं, बलहानिः, मर्यादा–षोडश वासराः, अयं व्याधिः कृच्छ्रसाध्यः। केषांचिन्मते अयं साध्यः ( मा. ज्वर. २२ )
त्रिदोषी ज्वराचा प्रकार. **लक्षण**–खोकला, श्वास, अंगाच्या आगेने व्याकुळ होणे, कठीण काट्यांनी युक्त जीभ, बहिरेपणा, मुकेपणा, बलनाश. **मुदत**–सोळा दिवस; कष्टाने बरा होणारा. हा साध्य असे एक मत.

**जिह्वा**–स्त्री., शारीर० मुखावयवः कर्मेन्द्रियम् ( चशा. ७.७ ) जिह्वावयवस्योत्पत्तिः–कफरक्तमांसानां सारो जिह्वा प्रजायते ( सुशा. ४.२८ )
जीभ. तोंडातील अवयव. कर्मेन्द्रिय. **उत्पत्ति**-कफ रक्त व मांस यांचे सारभूत प्रसादरूप अंशांची मिळून.
**रसनेन्द्रियम्, सा च रसनेन्द्रियाधिष्ठानरूपा** ( चसू. ८.१० )
रस जाणणारा अवयव. रसनेंद्रियाचे अधिष्ठान.
**रसना**–( सुशा. १.४ )
रसनेंद्रिय, रसना, जीभ, ती रसनेंद्रियाचे ( रसज्ञान करणाऱ्या इंद्रियाचे ) अधिष्ठान.

**–कण्टक**–पु., जिह्वारोग० स त्रिविधः–वातजः, पित्तजः, कफजश्च; तत्र वातदूषिता कंटका–शाकपत्रवत् खरा, सुप्ता, स्फुटितजिह्वा; पित्तजा–रक्तमांसांकुरयुक्ता, दाहयुक्ता जिह्वा; कफजा–शाल्मलीकण्टकाभैः कण्टकैश्चिता बहला गुर्वी जिह्वा ( सुनि. १६.३७ ) ( असंउ. २५ ) द्र० 'जिह्वारोग'

जीभकाटा. **प्रकार** तीन. **वातज**–सागाच्या पानांसारखी खरखरीत, भेगा असलेली, रसज्ञान न देणारी. **पित्तज**–रक्त व मांसाचे अंकुरयुक्त दाह होणारी. **कफज**–सावरीच्या काट्यासारख्या काट्यांनी भरलेली जड जाड.

**–गतरोग**–पु., रोग॰ **जिह्वारोगः** ( सुनि. १६.३६ ) जिभेचा रोग.

**–जाड्य**–न., लक्षण॰ **जिह्वास्तम्भः** ( अहृसू. ७.२१ ) जीभ जड होणे, जीभ ताठरणे.

**–तल**-पु., **जिह्वाया अधोभागः** ( सुनि. १६.३८ ) जिभेचा खालचा भाग.

**–निर्गम**–पु., लक्षण॰ **जिह्वायाः बहिरागमनम्** ( चसि. ९.६ ) जीभ बाहेर येणे.

**–निर्लेखन**–न., कर्म॰ उपकरण॰ **जिह्वालेखनम् जिह्वा निर्लिखिता निर्मला क्रियते अनेनेति जिह्वाशोधनार्थं घर्षणम्** ( चसू. ५.७४–७५ ) ( सुचि. २४.१३ )

**जिह्वानिर्लेखनार्थं सौवर्णं राजतं ताम्रं वा काष्ठमयं मृदुपत्राकारं दशाङ्गुलं मृदु स्निग्धं साधनमुपयुञ्जीत। तेन सुखं जिह्वां लिखेत्, जिह्वानिर्लेखनं जिह्वाया मलं वैरस्यं, दौर्गन्ध्यं जडत्वं च हरति** ( भा. प्र. पूर्वदिनचर्या ४०.४१ )

जीभ घासणे, खरडणे. जीभ शुद्ध व्हावी म्हणून घासणे. जीभ घासण्याकरिता सोने रुपे तांबे किंवा लाकडाचे मऊ पानाच्या आकाराचे दहा अंगुळे लांब मऊ स्निग्ध असे साधन योजावे. याने सुखाने जीभ घासली जाते; तिचा मळ दुर्गंध जडपणा जातो व रुची येते.

**–निष्क्रमण**–न., लक्षण॰ **जिह्वाया बहिरागमनम्** ( असंनि. ५.४६ ) जीभ बाहेर येणे.

**–निस्सरण**–न., लक्षण॰ **जिह्वाबहिर्निर्गमनम्** ( डसुचि. ३४.१२ ) जीभ बाहेर येणे.

**–निःसर्पण**–न., ( परिव॰ ) लक्षण॰ **जिह्वाबहिर्निर्गमनम्** ( ड सुचि. ३४ १२ ) जीभ बाहेर येणे.

**–प्रबन्ध**–पु., **जिह्वामूलम्** ( सुनि. १६.५२ ) जिभेचे मूळ. जिभेचे बंधन.

**–प्रबन्धन**–न., **जिह्वामूलम्** ( असंउ. २५ ) जिभेचे बंधन–मूळ.

**–बन्धन**–न., शारीर॰ **जिह्वाया बन्धनम्** ( असंशा. ५.१९ ) जिभेचे बंधन-मूळ.

**–मूल**–न., शारीर॰ **जिह्वाया मूलम्** ( चसू. १८.१९) जिभेचे मूळ-बंधन.

**–रोग**–पु., रोग॰ **स तु पञ्चविधः, वातपित्तकफजास्त्रिविधाः कण्टकाः, उपजिह्विकोऽलासश्च । तत्रालासस्य लक्षणानि–कफरक्तदुष्टिजन्यो जिह्वातलस्थः प्रगाढशोथः जिह्वास्तम्भः, भृशं जिह्वामूलपाकः** ( सुनि. १६.३८ ) द्र॰ **जिह्वाकण्टक**

जिभेचे रोग, पांच. कफपित्त वातज तीन प्रकार काटेयुक्त. उपजिह्वक व अलास. **अलास**–कफरक्तदुष्टीने जिभेच्या तळाशी सूज येते. **लक्षण**–सूज, ताठरणे व जिभेचे मूळ पिकणे. पहा ' जिह्वाकण्टक '.

**–विशोधन**–( वि., ) **जिह्वाया विशोधनं कुर्वाणं चूर्णम्** ( चचि. ८.१४३ )

जीभ शुद्ध करणे–जीभ–शुद्धि. जीभ शुद्ध करणारे ( चूर्ण, द्रव्य इ॰ ).

**–शोफ**–पु., लक्षण॰ **जिह्वाशोथः** ( असंशा. ११.३ ) जिभेची सूज.

**–श्वयथु**–पु., **जिह्वायाः शोथः** ( चइ. ११.१५ ) जिभेची सूज.

**–स्तम्भ**–पु., वातरोग॰ **वाग्वाहिनीसिरासंस्थो वातो जिह्वां स्तम्भयति । तेनान्नपानवाक्येष्वसामर्थ्यं जायते** ( असंनि. १५.३३ )

जीभ ताठरणे, वाचावाही सिरातील वात जीभ ताठरवितो. अन्नपान घेण्यात व बोलण्यात अशक्तता येते.

**जिह्वेन्द्रिय**–न., ज्ञानेन्द्रिय॰ **जिह्वाग्रस्थेन्द्रियं, रसेन्द्रियम्** ( सुचि. २४.२२ )

ज्ञानेंद्रिय, रसनेंद्रिय जिव्हेच्या अग्रभागी असलेले.

**जीमूत**–पु., वनस्पति॰ **मुस्ता** (सुचि. ३७.२७ ध. १.४१) नागरमोथा.

**देवदाली** ( सुचि. ३१.५ ) देवडांगरी.

न., **अभ्रकम्** ( र. १९.३ ) अभ्रक.

पु., **मेघः जीवनं जलं मूत्रयति स्रावयति इति जीमूतः** ( सुसू. २९.३० ) मेघ.

**–कल्प**–पु., योग॰ **देवदालीकल्पः** (चक. २.१ ) देवडांगरीचा औषधियोग.

**जीमूतक**–पु., वनस्पति॰ **देवदाली** ( सुचि. १८.२०–२१ ) देवडांगरी.

**–कल्प**–पु., अध्याय॰ ( चक. २.१ ) अध्यायाचे नाव.

**–तैल**–न., **देवदाली फलतैलम् अनिलकफक्रमिकुष्ठादिरोगापहरम्** ( सुसू. ४५.११५ )

देवडांगरीच्या फळाचे तेल. वात कफ क्रमि इ॰ हर.

**जीमूतादिगुटिका**–स्त्री., पारदयोग० अभ्रकगन्धकलोहताम्रवत्सनाभादियुक्ता मध्वनुपानपूर्विका रात्रौ सेव्यमाना सकलोदरनाशिनी ( र. १९.३ )
पाऱ्याच्या संयोगाने केलेली गोळी. पारा गंधक अभ्रक लोह ताम्र बचनाग इ० युक्त. सर्व उदररोग नाशक. अनुपान मध. रात्रौ घ्यावी.

**जीर**–पु., न., वनस्पति० जीरकम् ( र. १६.६४ ) जिरे.

**जीरक**–पु., न., वनस्पति० तद्गुणाः–कटुः उष्णः रूक्षो दीपनो वातघ्नो गुल्माध्मानातिसारग्रहणीकृमिनाशकः; शुक्लकृष्णभेदेन जीरको द्विविधः तत्र शुक्लजीरकः–मधुरः, कटुः, शीतो, रुच्यश्चक्षुष्यः, आध्मानकृमिविषनाशकः, कृष्णजीरकः–कटुः, उष्णः, रुच्यश्चक्षुष्यो, ग्राही, कफघ्नो, जीर्णज्वरशोथनाशकः ( ध. ६६–७० ) ( रा. ६.१००–१०६ )
हिं.—सफेदजीरा, शहाजीरा.
म.—जिरे.
गु.—सफेद जीरन्.
बं.—सफेद जीरा.
ता.—जीरक.
फा.—झीरा.
जिरे. प्रकार २ पांढरे व काळे. **पांढरे**–गोड तिखट थंड रुचकर रुचि उत्पन्न करणारे डोळ्याला हितकर पोटफुगी व कृमिनाशक. **काळे**–तिखट उष्ण मळ घट्ट करणारे रुचि उत्पन्न करणारे डोळ्याला हितकर कफनाशक जीर्णज्वर व सूज नाशक.

**( जीरिका )**–स्त्री., वनस्पति० वंशपत्री ( रा. ८.५४ )
बांबूच्या पानांसारखी पाने असणारी वनस्पती.

**–द्वय**–न., श्वेतजीरकं कृष्णजीरकं चेति, द्र० 'जीरक' ( र. १२.५६–५९ )
पांढरे व काळे जिरे.

**जीरकाख्या**–स्त्री., धान्य० व्रीहिः ( रा. १६.९८ )
जिरेसाळ, ज्वारे, एक सुगंधी तांदूळ.

**जीरकादिषाडव**–पु., योग० जीरकत्र्यूषणनागकेशरहरिद्रायुक्तः, सर्वमूषिकविषघ्नः ( असंउ. ४६ )
जिरे, त्र्यूषण ( सुंठ मिरी पिंपळी ) नागकेशर, हळद, ह्या सहा औषधांचा गट. सर्व उंदरांचे विष नाशक.

**जीर्ण**–वि., जरायुक्तम् ( असंसू. ४. )
जीर्ण, वृद्ध–म्हातारपण असलेला.
सुपक्वं सम्यक्परिणतमशितखादितायन्नम् । जीर्णलक्षणानि–क्षुद्वेगमोक्षौ लघुता विशुद्धिः ( चचि. ३०.३०३ )
चांगले पचलेले–जिरलेले अन्न. अन्न जिरणे. **लक्षण**–भूक, मल मूत्र प्रवृत्ति. हलकेपणा व हृदय शुद्ध होणे.
पु., वनस्पति० जीरकम् ( रा. ६.१०० ) जिरे.
न., वनस्पति० शैलेयम् ( ध. ३.७३ ) दगडफूल.

**( जीर्ण )–गन्ध**–वि., गन्धकजारितः ( पारदः ) तेन गन्धजीर्ण इत्येवार्थः प्राप्नोति · ( र. ३.१५७–१५८ ) गंधक जिरवलेला पारा.

**( जीर्णा )**–स्त्री., वनस्पति० वृद्धदारुः ( रा. ३.१५७ )
वरधारा.
पृथ्वीका ( रा. ६.९१ ) बाफळी.

**–घृत**–न., घृत० प्राचीनघृतम्, दशवत्सरावस्थितं घृतम् ( चसि. ९.७७ ) तत्पानं संन्यासरोगातुरे प्रबुद्धसंज्ञे सति प्रशस्तम् ( सुउ. ४६.२४ )
जुने तूप. दहा वर्षांचे तूप. शुद्धीवर आलेल्या संन्यास रोगपीडिताला देण्यास उत्तम.

**–ज्वर**–पु., रोग० देहधात्वबलत्वाच्च ज्वरो जीर्णो भूत्वाऽनुवर्तते । सामान्यतः सन्ततादिज्वरेषु दशाहाद्यनन्तरमस्य मन्दत्वेनावस्थितिः । जीर्णज्वरे वातः पित्तं च देहेऽतिरौक्ष्यं जनयतः, तस्मादस्मिन् ज्वरे घृतं प्रशस्यते; घृतस्य वातपित्तजितामग्र्यत्वात्, ( अहचि. १.८४ ) यो ज्वरः त्रिसप्ताहे व्यतीते तनुतां गच्छति तथा प्लीहाग्निसादं कुरुते, स जीर्णज्वरः ( मधुकोश, माज्वर. ६५. )
जीर्णज्वर, मुरलेला ताप, बारीक ताप. शरीरधातूंच्या अबलत्वामुळे ज्वर शरिरात मुरतो व दररोज येतो. संततादि ज्वरात दहा दिवसानंतर तो मंद होतो. जो ज्वर तीन आठवड्यानंतर बारीक होतो, प्लीहावृद्धि व पाचक अग्नि मंद करतो, त्याला जीर्णज्वर म्हणतात.
**उपचार**–जीर्णज्वरात वात पित्त हे दोष शरिरात रौक्ष्य निर्माण करतात म्हणून यात तूप उत्तम. कारण ते वातपित्त जिंकणाऱ्या द्रव्यांपैकी सर्वात उत्तम आहे.

**–ज्वरादि**–पु., पारदयोग० नागवङ्गताम्रगन्धकजेपालादियुक्तः, जीर्णज्वरघ्नः ( र. १४.१६०-३ )
पाऱ्याचा योग. शिसे कथील तांबे यांचे भस्म गंधक जेपाळ पाऱ्यात घालून केलेला जीर्णज्वरनाशक योग.

**–दारु**–पु., वनस्पति० वृद्धदारुः ( रा. ३.१५७ )
वरधारा.

**–नेत्र**–न., बस्तिनेत्रदोषेष्वेकः ( चसि. ५.४–५ )
बस्तीच्या विधीत गुदात घालावयाच्या नळीचा एक दोष. ती जुनी खडबडीत असणे इ०

**–पत्र**–पु., वनस्पति० **पूगः** ( रा. ६.२४० ) सुपारी.
**–पत्रिका**–स्त्री., वनस्पति० वंशपत्री (रापरि. ८.५४) बांबूच्या पानांसारखी पाने असणारी वनस्पती.
**–पर्ण**–पु., वनस्पति० **पूगः** ( ध. ३.१७७ ) सुपारी.
**–पिण्याक**–न., **पुराणपिण्याकम्** (असंसू. ११.३५) जुनी पेंड.
**–पुष्पक**–न., वनस्पति० **परिपेलम्** ( ध. ३.५५ )
**–बुध्न**–पु., वनस्पति० **पूगः** ( रा. ६.२४० ) सुपारी.
**–बुध्नक**–न., वनस्पति० **परिपेलम्** ( ध. ३.१०५ ) नागरमोथ्याची जात.
**–रस**–पु., **जीर्णपारदः** ( र. २४.९३ ) गंधकादि ज्यांत जिरविली आहेत असा पारा.
**–वज्र**–न., खनिज० **वैक्रान्तम्** ( ध. ६.४४ ) वैक्रांत. तोरमल्ली.

**जीर्णान्तिक**–वि., **जीर्णे यत् प्रयुज्यते तत्** (अहसू. ४.७) अन्न जिरल्यानंतर जे दिले जाते ते.

**जीर्णान्न**–न., **परिणताहारः** ( सुचि. ३७.६८ ) अन्न जिरलेला. शरीर घटकरूप झालेला आहार.

**जीर्णाहार**–पु., **परिणताहारः** ( असंसू. ११.६९–७० ) पहा 'जीर्णान्न'.

**जीव**–पु., **चेतनाधातुः, आत्मा** ( चशा. ३.३ ) चेतनाधातु, आत्मा.
**जीवति प्राणिति इति जीवः प्राणः** ( सुसू. १४.४४ )
प्राण, जीव, आत्मा.
**–दा**–स्त्री., वनस्पति० **जीवन्ती** ( रा. ३.१७७ ) जीवन देणारी वनस्पती.
**–दात्री**–स्त्री., वनस्पति० **ऋद्धिः** ( रा. ५.१८७ ) जीवन देणारी वनस्पती.
**जीवन्ती** ( रा. ३.१७७ ) जीवन देणारी वनस्पती. हरणदोडी.
**–नेत्रा**–स्त्री., वनस्पति० **सैंहली–पिप्पली** ( रा. ६.१२० ) पिंपळीचा प्रकार.
**–पृष्ठा**–स्त्री., वनस्पति० **जीवन्ती** ( रा. ३.१७८ ) **बृहज्जीवन्तिका** ( रा. ३.१७९ ) जीवन देणारी वनस्पती. हरणदोडी.
**–प्रिया**–स्त्री., वनस्पति० **हरीतकी** ( रा. ११.३०६ ) हिरडा.
**–भद्रा**–स्त्री., वनस्पति० **जीवन्ती** ( रा. ३.१७७ ) जीवन देणारी वनस्पती. **ऋद्धिः** ( रा. ५.१८८ ) जीवन देणारी वनस्पती.
**–वर्धनी**–स्त्री., वनस्पति० **जीवन्ती** ( ध. १.१४० ) जीवन देणारी वनस्पती.
**–रक्त**–न., **जीवनहेतुधातुरूपं शोणितम्** ( चक्र. ) **तेन मिश्रितमन्नं वायसः श्वा वा भक्षयेत्तर्हि तज्जीवशोणितम् न चेत् पित्तमादिशेत्** ( चसि. ६.७९ ) **यद्युष्णोदकप्रक्षालितमपि वस्त्रं रञ्जयति तज्जीवशोणितम्** ( सुचि. ३४.१४ ) **शरीरेन्द्रियसत्त्वात्मसंयोगाश्रयं रक्तं जीवशोणितम्** ( सुचि. ३४.१३ ) **तस्य पञ्चभूतगुणाः–विस्रता, द्रवता, रागः, स्पन्दनं, लघुता** ( सुसू. १४.८–९ ) **जीवशोणितातिप्रवृत्तेश्चिकित्सा–काश्मरीफलबदरीदूर्वोशीरैः शृतेन पयसा घृतमण्डाञ्जनयुतेन सुशीतेनास्थापयेत्** ( सुचि. ३४.१३ )
जीवन चालविणारे धातुरूप रक्त. जे मिश्र केलेले अन्न कावळा किंवा कुत्रा खाईल तर ते जीवशोणित; व न खाईल तर ते पित्त (रक्तपित्त). रक्ताने भरलेले पांढरे वस्त्र ऊन पाण्याने धुतले असतांही ते रंगीत रहाते ते जीवशोणित. ते शरीर इंद्रिय सत्त्व आत्मा यांच्या संयोगाचे आश्रयस्थान आहे. त्याचे पृथिवी इ० पंचभूत गुण क्रमाने–दुर्गंध पातळपणा लाल रंग स्पंदन हलकेपणा हे होत. हे जीवशोणित अतिशय शरिरातून जात असेल तर शिवणीचे फळ बोर दूर्वा काळा वाळा यांनी सिद्ध दुधात तुपाची निवळी व सुरमा घालून थंड बस्ति द्यावा.
**–लिङ्ग**–न., **शरीरे आत्मनो लक्षणम्** ( चवि. ८.६० ) शरिरात आत्म्याचे लक्षण.
**–वल्ली**–स्त्री., वनस्पति० **क्षीरकाकोली** (रा. ३.१६९) दुधीकावळी.
**–शाक**–पु., वनस्पति० **जीवन्तः** ( रापरि. ७.८९ ) तांबडी पाने व नाल असलेली माळव्यातील चांगली गोड वनस्पती.
**–शुक्ला**–स्त्री., वनस्पति० **क्षीरकाकोली** (रा. ३.१६९) दुधीकावळी.
**–शोणित**–न., **जीवरक्तम्** ( चसि. ६.७९ ) विशुद्धरक्त, धातुरक्त, रक्तधातु.
**–शोणितातिप्रवृत्ति**–स्त्री., **जीवरक्तातिप्रवृत्तिः**, द्र० '**जीवरक्त**' ( सुचि. ३४.१३ ) विशुद्ध रक्ताचा अतिस्राव.
**–श्रेष्ठा**–स्त्री., वनस्पति० **ऋद्धिः** ( रा. ५.१८७ ) जीवन देणारी वनस्पती.

**-संयोग**–पु., जीवस्य सम्यग्योगः ( चशा. ४.५ )
जीवाचा शरीर इंद्रिये इ० शी चांगला (योग्य) संयोग.

**जीवक**–पु., प्रतुदपक्षि० ( चसू. २७.५० ) **एष विषसंसृष्टमन्नं दृष्ट्वा म्रियते** ( सुक. १.३१ )
चकोर. विषमिश्रित अन्न पाहून मरतो.

**जीवक**–पु., **वनस्पति० स्नेहोपगगणैकं द्रव्यम्** ( चसू. ४.१३ ) **जीवनीयगणेऽष्टवर्गे चैकं द्रव्यम्** ( चसू. ४.९;३.२२ ) **गुणाः–मधुरः शीतः शुक्रलः कफकरो वातपित्तघ्नो रक्तपित्तदाहज्वरक्षयघ्नः** ( ध. १.१२३ )
जीवन देणाऱ्यांपैकी, स्नेहनाला मदत करणाऱ्यांपैकी अष्टवर्गातील एक वनस्पती. **गुण**–गोड थंड शुक्रवर्धक वातपित्तघ्न कफकर रक्तपित्त दाह ज्वर क्षयनाशक.
**शाक० लोणिकादिशाकवर्गेष्वेकं द्रव्यं, स्वादुरसपाको लवणानुरसः शीतो रूक्षः सरो वातकरः कफघ्नो नातिपित्तलः** ( सुसू. ४६.२७४ )
घोळ इत्यादी भाजीवर्गातील. रसाला व पचल्यावर गोड; मागाहून खारट चव, थंड रूक्ष, सारक कफघ्न वात व थोडे पित्त करते.
**कूर्चशीर्षकः** ( डसुसू. ३८.४ )
जीवनदायक अष्टवर्गातील वनस्पती. हिचा शेंडा कुंचल्यासारखा.
**ऋषि० ऋचीकतनयः, स महातन्त्रकाश्यपसंहितां संचिक्षेप** ( काक. २० )
ऋचीक ऋषीचा मुलगा. याने काश्यपसंहिता एकत्र केली.

**जीवञ्जीव**–पु., **पक्षि० जीवजीवकः** ( अहसू. ७.१५;६.४६ ) चकोर. कृकणपक्षी.

**जीवञ्जीवक**–पु., जीवञ्जीवः ( अहसू. ७.१५,६.४६ ) ( चइ. १२.७५ ) चकोर. कृकणपक्षी.

**जीवद्वत्सा**-वि., **जीवन् प्राणन् वत्सस्तर्णको यस्याः सा** ( चशा. ८.५२ ) जिचे वासरू जिवंत आहे ती.

**जीवन**–वि., **यो जीवयति सः प्राणधारणः** ( सुसू. ४६.५१७ ) ( चसू. २६.४३१ )
जो जगवतो तो. प्राणधारण.
पु., **वनस्पति० जीवकः** ( रा. ५.१५४ )
जीवनदायक वनस्पती.
•न., **जलम्** ( रा. १४.३१७ ) पाणी.
वि., **ओजोवृद्धिकरम्** ( र. २९.३५ )
ओजाची वृद्धि करणारे.

**( जीवन )–पञ्चमूल**–न., **वनस्पति० शतावरीवीराजीवन्तीजीवकऋषभकानां मूलानि** ( ध. ७.२५ ) ( अहसू. ६.१७० )
जीवनदायक शतावरी इत्यादि पाचांची मुळे.
**–संज्ञ**–पु., **जीवनीयो गणः** ( असंसू. १६.६ )
जीवनदायक वनस्पतींचा वर्ग.

**जीवनिका**–स्त्री., **वनस्पति० हरीतकी** ( रा. ११.३०६ )
हिरडा.

**( जीवनी )**–स्त्री., **वनस्पति० जीवन्ती** ( ध. १.१४० )
जीवनदायी वनस्पती.
**अन्यादोडी** ( रापरि. ४.४१ ) हरिणदोडी.
**मेदा** ( रा. ५.१६० ) मेदा.
**महामेदा** ( रा. ५.१६३ ) महामेदा.
**शाक० फञ्जादिशाकवर्गोक्तं शाकम्** (रापरि. ७.९४)
एक भाजी.

**( जीवा )**–स्त्री., **वनस्पति० जीवन्ती** ( रा. ३.१७७ )
जीवन देणारी वनस्पती.

**जीवादान**–न., **रोग० रक्तस्रावाधिक्यम्** ( चसू. २०.१४ ) **जीवशोणितस्य हरणं तेन च जीवितनाशः, वमनविरेचनातियोगेनायमुपद्रवो भवति** ( चसू. १५.१३ )
रक्तस्राव अधिक होणे. रेचक वामक ही अधिक लागू झाली तर विशुद्ध रक्ताचा स्राव होऊ लागतो. हे जाणारे रक्त जीव मारते ( उपद्रव )

**जीवाभिसन्धान**–वि., **जीवं रक्ष्यत्वेन अभिसन्धत्ते विचारयति लक्षयति वा तज्जीवाभिसन्धानं (रक्तम्)** ( चसि. ६.८२ )
जीवाचे रक्षण करण्याच्या दृष्टीने शरिरात कार्य करते ते रक्त. विशुद्ध रक्त.

**जीविका**–स्त्री., **उपजीविका** ( काशा. )
चरितार्थाचे साधन.
**खनिज० पारदः** ( र. १.८३–८४ ) पारा.
**अन्या जीवगतिर्दैवी जीवोऽण्डादिव निष्क्रमेत् । स तांश्च जीवयेज्जीवांस्तेन जीवो रसः स्मृतः '**
दुसऱ्या एका दैवगतीला अनुसरून अंड्यातून जीव बाहेर येतो. अशा त्या जीवांना जगवतो म्हणून रस म्हणजे पारा हा सुद्धा जीव म्हटला आहे.

**जीवोपक्रमण**–न., **जीवात्मप्रवेशः, शुक्रशोणितमेलने जीवात्मा पूर्वकर्मतः प्रविशति** ( चचि. ३०.१२६ )
जीवाचा प्रवेश, शुक्र व आर्तव यांचे मीलन होते तेव्हा जीव–( आत्मा ) प्रवेश करतो.

**जीवनीय**–वि., प्राणधारणक्रियौपयिकम् ( चसू. १.१०८ )
जीवने हितः ( चसू. ४.८ )
प्राणधारण क्रियेला उपयुक्त. जीवनोपयोगी.
न., घृतम् ( ध. ६.१४४ ) तूप.

**( जीवनीया )**–स्त्री., वनस्पति० जीवन्ती ( ध. १.१४० )
जीवंती.

**–गण**–पु., द्रव्यगण० जीवकर्षभकौ मेदा महामेदा काकोली क्षीरकाकोली मुद्गपर्णीमाषपर्ण्यौ जीवन्ती मधुकमिति दशेमानि जीवनीयानि ( चशा. ४.९ ) ( असंसू. १५ )
जीवनदायी द्रव्यांचा वर्ग. या दहा वनस्पती.

**–घृत**–न., घृत० जीवनीयादिगणोक्तद्रव्यैर्विपाचितम्, तद्गुणाः–बलवर्णकरं वलीपलितनाशनं वृष्यं वन्ध्यासुतप्रदं वातरक्तपाण्डुरोगादिषूपयुक्तम् ( चचि. २९.६१–७० ) पित्तोन्मादनाशकम् ( चचि. ९.७६ ) शुष्काक्षिपाकेऽस्य नस्यं प्रशस्तम् ( सुउ. ९.२२ )
जीवनदायी वनस्पती घालून कढवलेले तूप. बलवर्धक वर्ण चांगला करणारे अंगावरच्या सुरकुत्या व पिकलेले केस नाहीसे करणारे शुक्र वर्धक वंध्येला मूल देणारे वातरक्त पित्तोन्माद पांडु इत्यादीवर उपयुक्त. शुष्कपाक या डोळ्याच्या विकारात नाकात घालण्यास उपयुक्त.

**–तैल**–न., तैल० पित्ते जीवनीयसाधितमनुवासनं हितम् ( चसि. ३.३७० )
जीवनदायी वनस्पतींनी सिद्ध केलेले तेल. पित्ताधिक्य असता अनुवासन स्नेहबस्तीकरिता चांगले.

**–वर्ग**–पु., ( परिव. ) जीवनीयगणः ( चसू. ४.९ )
जीवनदायी वनस्पतींचा वर्ग.

**–सर्पिस्**–न., घृत० जीवनीयघृतम् ( चचि. ९.७६ )
जीवनदायी वनस्पतींनी सिद्ध केलेले तूप.

**जीवनीयाम्बु**–न., जीवनीयशृतं जलम् ( असंउ. १. )
जीवनदायी वनस्पतींनी उकळलेले पाणी.

**जीवन्त**–पु., वनस्पति० बृहद्गान्धारः ( अरु. ) रक्तनालो मार्षः ( हे अहसू. ६.९४ ) शाक० गुणाः–मधुरो दीपनः पाचनो बल्यो बृंहणो वृष्यो बस्तिशोधनः ( रापरि. ७.८९–९० )
मोठा गांधार. गांधार–रक्त्याबोळ. मार्ष ( माठ ) **तांबडा माठ–गुण**–गोड अग्निदीपक पाचक बलवर्धक पौष्टिक शुक्रवर्धक लघ्वी शुद्ध करणारा.

**जीवन्ति**–स्त्री., वनस्पति० जीवन्ती ( चसू. ३.२५ )
जीवनदायी वनस्पती.

**जीवन्तिक**–न., शाक० वातपित्तनुत् ( चसू. २७-१०७ )
जीवंती. हरिणदोडी.

**( जीवन्तिका )**–स्त्री., शाक० जीवन्ति ( र. १०.९३ )
जीवंती. हरिणदोडी.

**जीवन्ती**–स्त्री., शाक० जीवनीयगणेष्वग्रणीः स्नेहोपगगणे वयःस्थापनगणे श्वासहरगणे चैकं द्रव्यम् ( चसू. ४.९,१३,१६,१८ ) पटोलसमानपत्रा, कन्दवती ( सुउ. ५१.२७ ) गुणाः–मधुरा, शीता, चक्षुष्या, कफकरी, वीर्यकरी, त्रिदोषघ्नी, रक्तपित्तक्षयदाहज्वरघ्नी ( ध. १.१४०–१४१ ) स्निग्धा, लघु, रसायनी, ग्राहिणी ( भाप्र. ) बल्या ( र. २८.७४–७५ )
हिं.—जीवन्ती.
**म.—जीवन्ती.**
गु.—राडारुडी.
बं.—जीवन्ती.
भाजी. जीवनदायक वर्गात मुख्य, शरीर स्निग्ध करणाऱ्या द्रव्यांना मदत करणाऱ्या वर्गात, तारुण्य कायम ठेवणाऱ्या वर्गात, श्वास नाशक वर्गात एक कंद असलेली पडवळाच्या पानांप्रमाणे पाने असलेली. **गुण.** गोड थंड हलकी स्निग्ध मळ घट्ट करणारी डोळ्याला हितकर वीर्यवर्धक सर्वधातुपरिपोषक त्रिदोषशामक पण थोडी कफवर्धक रक्तपित्त क्षय दाहज्वर नाशक.
**अन्यादोडी** ( रा. ४.४१ ) हरिणदोडी.
**गुडूची** ( ध. १.३ ) गुळवेल.
**ताम्बूली, नागवल्ली** ( ध. परि. ३.२ )
विड्याच्या पानाची वेल.
**हरीतकी** ( रा. ११.३०७ ) हिरडा.
**सुवर्णनाला** ( चसू. ५.६५ )
सोनेरी दांडी असलेली वेल.

**–घृत**– ( परिव. ) न., घृत० एकादशरूपराजयक्ष्मण्युपयुक्तम् ( चचि. ८.१११–११३ )
जीवंती इत्यादी वनस्पतींनी सिद्ध तूप. क्षयाच्या अकरा लक्षणयुक्त प्रकारात उपयुक्त.

**–तैल**–न., तैल० मधुरं, मधुरपाकं, शीतवीर्यं, वातपित्तशमनं, सृष्टमूत्रमग्निसादनमभिष्यन्दि च ( सुसू. ४५.१२० )

सोनजीवंतीच्या बियांचे तेल. गोड पचनानंतर ही गोड थंड वातपित्तशामक ओलावा व लघ्वीची प्रवृत्ति निर्माण करणारे पाचकाग्नि कमी करणारे.

**–शाक**–न., शाक० ( चसू. २५.३८ ) **चक्षुष्या, त्रिदोषघ्नी** ( सुसू. ४६.२५२ ) **शाकेषु जीवन्ती श्रेष्ठा** ( असंसू. ७.१६८ )

भाज्यात श्रेष्ठ. भाजी डोळ्याला हितकर त्रिदोषनाशक.

**जीवन्त्यादि–तैल**–न., तैल० **पित्तरक्तरोगार्दितेषूपयुज्यते** ( सुचि. ३७.२३–२६ )

जीवंती इत्यादी द्रव्यांनी सिद्ध तेल. पित्त रक्त दूषित रोगांनी पिडलेल्यांना देतात.

**जीवला**–स्त्री., वनस्पति० **सिंहली पिप्पली** ( रा. ६.१२० ) सिंहली पिंपळी.

**जीवा**–स्त्री., वनस्पति० **जीवन्ती** ( रा. ३.१७७ ) जीवंती.

**जीवित**–न., **आयुः** ( चसू. १.४२ )

**प्राणाः** ( र. १.३३ ) आयुष्य–प्राण.

**आहारद्रव्य० दुग्धम्** ( ध. ६.१६१ )

आहाराचे द्रव्य. दूध.

**जीविताभिसर**–पु., **प्रयोगज्ञानविज्ञानसिद्धिसिद्धो वैद्यः, जीवितमायुरभिसरति अभिसारयति नाम प्रापयति रोगिणमिति जीविताभिसरः** ( चसू. ११.५३ )

आयुष्य प्राप्त करून देणारा औषधी प्रयोग. शास्त्र-ज्ञान त्याचे विज्ञान त्यांची सिद्धि ज्याला प्राप्त झाली आहे असा वैद्य.

**जीवितायतन**–न., **प्राणायतनम्** ( असंशा. ६.२७ )

प्राणाचे घर, आधारस्थान.

**जीविनी**–स्त्री., वनस्पति० **काकोली** ( रा. ३.१६७ )

कावळी. जीवनदायी अष्टवर्गापैकी एक.

**जीव्य**–पु., वनस्पति० **जीवकः** ( रा. ५.१५४ )

जीवनदायी अष्टवर्गापैकी एक.

**( जीव्या )**–स्त्री., वनस्पति० **जीवन्ती** ( रा. ३.१७७ ) जीवंती.

**हरीतकी** ( रा. ११.३०७ ) हिरडा.

**जुगुप्सु**–वि., **निन्दकः** ( सुसू. ३४.२४ ) निंदक.

**जुङ्गक**–पु., वनस्पति० **वृद्धदारुकः** ( ध. ४.१०७ ) वरधारा.

**जुष्ट**–वि., **सेवितम्** ( चचि. १२.३ )

खाल्लेले, घेतलेले, उष्टे.

**युक्तः** ( सुचि. ३.३ ) युक्त, सहित.

**जूनल**–पु., वनस्पति० **धवलयावनालः** ( रा. १६.१६९ ) द्र० **'जूर्णाह्वय'**

पांढरा जोंधळा, ज्वारी.

**जूर्णल**–पु., वनस्पति० **धवलयावनालः** ( रा. १६.१६९ ) द्र० **'जूर्णाह्वय'**

पांढरा जोंधळा, ज्वारी.

**जूर्णा**–स्त्री., धान्य० ( अहसू. १४.२१ ) **गुणाः–शीता, रूक्षा, गुरुर्वृष्या, विष्टम्भिनी, कफपित्तघ्नी** ( ध. ६.१०८ )

**जोंधळा. गुण**–थंड, रूक्ष, पचनास जड, वृष्य अवष्टंभकारक व कफ पित्त नाशक.

हिं.—ज्वार.

**म.—जोंधळा.**

गु.—जुवार.

बं.—देधान.

ता.—जोन्नळ.

फा.—जुरेमखा.

**जूर्णाह्व**–पु., धान्य० **जूर्णभेदः** ( अहसू. १४.२१ ) **गुणाः–कषायः मधुरो लघुः वातलः कफपित्तघ्नः शीतः संग्राही शोषणः** ( चसू. २७.१८ )

**एक प्रकारचा जोंधळा**–थंड, रूक्ष, जड, शुक्राला हितकर, मलावरोधक, कफपित्तनाशक. **दुसरा प्रकार**–गोड, तुरट, हलका, थंड, वातुळ, कफपित्त-नाशक व मळाला घट्ट करणारा.

**जूर्णाह्वय**–पु., धान्य० **जूर्णभेदः** ( रा. १६.१६९ ) **जूर्णाह्वयस्य यावनालस्य प्रकाराः–धवलयावनालः, तुवरयावनालः, रक्तयावनालः, शारदयावनालः । गुणाः–धवलयावनालस्तु गौल्यो बल्यस्त्रिदोषजित् । वृष्यो रुचिप्रदोऽर्शोघ्नः पथ्यो गुल्मव्रणापहः । तुवर-यावनालस्तुवरश्च कषायश्च । रक्तयावनालो हितस्तु-वरश्च । "तुवरो यावनालस्तु कषायोष्णो विशोफ-कृत् । संग्राही वातशमनो विदाही शोषकारकः । शारदो यावनालस्तु श्लेष्मदः पिच्छिलो गुरुः । शिशिरो मधुरो वृष्यो दोषघ्नो बलपुष्टिदः"** ( रा. १६.१७०–७३ पृ. २२९ )

जोंधळा. प्रकार ४ पांढरा, तांबडा, तुरट व शरदृतूत होणारा. **पांढरा**–गोड रुचकर, त्रिदोषनाशक शुक्राला हितकर, पथ्यकर, बलकर, गुल्म, मूळव्याध व व्रण-नाशक. **तांबडा**–तुरट पण हितकर. **तुरट**–तुरट, उष्ण, मलावरोधक, जळजळ. तोंडाला कोरड, सूज नाशक वातशामक. **शरदृतूतला**–गोड, जड, बुळ-बुळीत, थंड, दोषघ्न, शुक्रधातूला हितकर, बलपुष्टि-दायक, कफवर्धक.

**जूर्ति**–स्त्री., रोग० ज्वरः ( र. २२.७७ ) ज्वर, ताप.

**जृम्भ**–पु., जृम्भा, एकमनिलोच्छ्वासं पीत्वा विवृताननः सन्नुद्वेष्टन् श्वासं सनेत्रास्रं मुञ्चति स जृम्भः ( सुशा. ४.५० )

**जृम्भण**–न., लक्षण० जृम्भा ( चनि. ७.४९ ) वायुकृता मुखविवृतिः ( चसि. ३.२८–२९ ) श्वासोच्छ्वासस्य विशेषस्वरूपं जृम्भणम् ( सुशा. ४.४९ )
जांभई. वायूने केलेला तोंडाचा विस्तार. तोंडाने श्वासोच्छ्वास करण्याचे एक विशेष स्वरूप.

**( जृम्भा )**–स्त्री., रोग० अशीतिवातविकारेष्वेकः ( चसू. २०.११ ) ( चनि. १.३३ )
एकं श्वासं पीत्वा चैतन्यशिथिलत्वाद्विदीर्णवदनः सन् तं श्वासमुद्वमेत्, सा जृम्भा कथ्यते ( शार्ङ्ग. ५७.२६ )
जृम्भाया विधारणादुदावर्तोद्भवः ( सुउ. ५५.४१ )
जृम्भायाः निग्रहादुदावर्तो भवति, स वातप्रकोपजः जृम्भानिग्रहजे उदावर्ते मन्यास्तम्भो गलस्तम्भः, सूर्यावर्तादिशिरोरोगाः, कम्पसुप्त्यादिवातरोगाः, कर्णरोगा मुखरोगा नासारोगा नयनामया इत्येवमादयो विकारा भवन्ति ( सुउ. ५५.११ )
जांभई. मरगळलेल्या मनुष्याकडून आ करून हवेचा एक श्वास पिऊन तो चैतन्य शिथिल झाल्यामुळे पुन्हा डोळ्यात अश्रु येऊन बाहेर सोडला जातो त्याला जांभई म्हणतात. ऐशी वाताविकारातील एक. जांभई अडविली तर वात अडतो व दुःखद चिन्हे निर्माण होतात ( उदावर्त. ) मान ताठरते, गळा जखडतो, सूर्यावर्तादी डोक्याचे रोग कंप त्वचेचा संज्ञानाश, कान तोंड नाक डोळे इ० चे विकार होतात.

**जृम्भा**–स्त्री., ( चसू. २०.११ ) जांभई.

**जृम्भिका**–स्त्री., जृम्भा ( अहसू. ४.१२ ) जांभई.

**जृम्भोपघात**–पु., जृम्भावेगावरोधः, एतस्मादुदावर्तो भवति ( सुउ. ५५.११ ) द्र० 'जृम्भा'
जांभई अडवणे. यामुळे उदावर्त रोग.

**जेन्ताक**–पु., कूटागारम्, इदं स्वेदविधावुपयुज्यते ( चसू. १४.४६ ) दालन. घाम काढण्याची खोली.

**–स्वेद**–पु., स्वेद० जेन्ताकनिर्माणं स्वेदविधिश्च जेन्ताकं चिकीर्षुर्भूमिं परीक्षेत–तत्र पूर्वस्यां दिश्युत्तरस्यां वा गुणवति प्रशस्ते भूमिभागे कृष्णमधुरमृत्तिके सुवर्णमृत्तिके वा परीवापपुष्करिण्यादीनां जलाशयानामन्यतमस्य कूले दक्षिणे पश्चिमे वा सूपतीर्थे समसुविभक्तभूमिभागे सप्ताष्टौ वाऽरत्नीरुपक्रम्योदकात् प्राङ्मुखमुदङ्मुखं वाऽभिमुखतीर्थं कूटागारं कारयेत्, उत्सेधविस्तारतः परमरत्नीः षोडश, समन्तात्सुवृत्तं मृत्कर्मसंपन्नमनेकवातायनम्, अस्य कूटागारस्यान्तःसमन्ततो भित्तिमरत्निविस्तारोत्सेधां पिण्डिकां कारयेदाकपाटात्, मध्ये चास्य कूटागारस्य चतुष्किष्कुमात्रं पुरुषप्रमाणं मृण्मयं कन्दुसंस्थानं बहुसूक्ष्मच्छिद्रमङ्गारकोष्ठकस्तम्भं सपिधानं कारयेत्, तं च खादिराणामाश्वकर्णादीनां वा काष्ठैः पूरयित्वा प्रदीपयेत्; स यदा जानीयात् साधुदग्धानि काष्ठानि गतधूमान्यवतप्तं च केवलमग्निना तदग्निगृहं स्वेदयोग्येन चोष्मणा युक्तमिति, तत्रैनं पुरुषं वातहराभ्यक्तगात्रं वस्त्रावच्छन्नं प्रवेशयेत्, प्रवेशयंश्चैनमनुशिष्यात्–सौम्य ! प्रविश कल्याणायारोग्याय चेति, प्रविश्य चैनां पिण्डिकामधिरुह्य पार्श्वापरपार्श्वाभ्यां यथासुखं शयीथाः, न च त्वया स्वेदमूर्च्छापरीतेनापि सता पिण्डिकैषा विमोक्तव्याऽऽप्राणोच्छ्वासात्, भ्रश्यमानो ह्यतः पिण्डिकावकाशाद्द्वारमनधिगच्छन् स्वेदमूर्च्छापरीततया सद्यः प्राणाञ्जह्याः। तस्मात् पिण्डिकामेनां न कथंचन मुञ्चेथाः, त्वं यदा जानीयाः विगताभिष्यन्दमात्मानं सम्यक्प्रस्रुतस्वेदपिच्छं सर्वस्रोतोविमुक्तं लघूभूतमपगतविबन्धस्तम्भसुप्तिवेदनागौरवमिति, ततस्तां पिण्डिकामनुसरन् द्वारं प्रपद्येथाः, निष्क्रम्य च न सहसा चक्षुषोः परिपालनार्थं शीतोदकमुपस्पृशेथाः, अपगतसंतापक्लमस्तु मुहूर्तात् सुखोष्णेन वारिणा यथान्यायं परिषिक्तोऽश्नीयाः, इति जेन्ताकस्वेदः ( चसू. १४.४६ )
विशिष्ट खोलीत घेतलेला शेक. अग्निगृहातील शेक.
**योग्य जमीन**–गावाच्या पूर्वेस किंवा उत्तरेस मोकळी विस्तृत भागात काळी गोड किंवा पिवळी माती असलेल्या सारख्या पातळीच्या जागेत, तसेच तळे किंवा सरोवर यांच्या दक्षिण किंवा पश्चिम काठावर पाण्याच्या काठापासून ७–८ लहान हातांवर असलेल्या घाटावर हे गोल घर बांधावे. त्याचे तोंड उत्तरेस, पश्चिमेस किंवा घाटाकडे असावे. अरत्नि म्हणजे लहान हात. हे दालन सोळा अरत्नि लांब रुंद व उंच असून यात भोवताली अनेक खिडक्या किंवा झरोके असलेल्या चांगल्या मातीच्या भिंती असाव्या. आत भिंतीला जोडून एक अरत्नि उंच व रुंद असा कट्टा दोन्ही बाजूंनी दारापर्यंत बांधावा.

या गोल दालनाच्या मधोमध एक हात व्यासाचा पुरुषभर उंच मातीचा पोकळ पुष्कळ सूक्ष्म छिद्रांचा वर झाकण असलेला खांब करावा. त्यात खैर साग बाभूळ इत्यादींची लाकडे घालून पेटवावी. धूर बंद होऊन केवळ निखारे राहिले व ते अग्नने तापले, म्हणजे अग्निगृह शेक देण्यास योग्य झाल्यावर रोग्याला वातहर तेलाने माखून कापडाने शरीर झाकून त्यात प्रविष्ट करावे. अगोदर सांगावे की "कट्ट्यावर बसून किंवा निजून या कुशीवरून त्या कुशीवर सुख होईल तसे वळावे. शेकाने मूर्च्छा आली तरी प्राण व श्वासोच्छ्वास करीत आहेस तोंपर्यंत कट्टा काहींही करून सोडू नकोस. तो सोडलास तर दार सापडणार नाही व घाम आणि मूर्च्छा यांनी हैराण होऊन प्राण जाईल." "शरीर हलके मोकळे व सर्व वेदना कमी झाल्यावर कट्ट्याला धरून दरवाजाकडे ये, बाहेर आल्यावर सरासरी एक तास स्वस्थ बसावे. थकवा व गरमी कमी झाल्यावर कोमट पाण्याने स्नान करून जेवावे. बाहेर येताच थंड पाण्याचा उपयोग केल्यास डोळ्यावर अनिष्ट परिणाम होईल."

**जेपाल**–पु., **वनस्पति० दन्तीबीजम्, प्रसिद्धं विरेचनं बीजम्** ( र. ५.२४९ ) **गुणाः–कटुरुष्णश्च क्रृमिहारी विरेचनो दीपनः कफवातघ्नो जठरामयशोधनः** ( ध. १.२२८ )
हिं.—जमालगोटा.
**म.—जयपाल, जेपाल.**
गु.—नेपाल.
बं.—जैपाल.
ता.—नीरेवेलम्.
फा.—तुखमेबेदं, जीरखताई.
**जयपाळ**–दांतीचे बी. **गुण**–तिखट उष्ण कृमिनाशक अतिविरेचक उदरविकार शुद्धिकर अग्निदीपक कफवातनाशक.

**जैत्र**–पु., **खनिज०** पारदः ( रा. १३.४१ )

**जैपाल**–पु., **वनस्पति० जेपालः** ( र. ५.२४९ )
जयपाळ.

**जोङ्गक**–न., **वनस्पति०** अगरुः ( चचि. १८ (४) १५ ) ( अहसू. १५.१९ ) अगरू.

**जोन्नलिका**–स्त्री., **धान्य० जूर्णा** ( ड. सुसू. ४६.२१ )
जोंधळा, ज्वारी, दादर.

**ज्ञ**–वि., **ज्ञाता** ( वैद्यः ) ( सुउ. ११.१० )
ज्ञाता; जाणणारा वैद्य.
**पु., आत्मा.** ( चशा. ४.८ ) आत्मा; जीव.

**ज्ञान**–न., **बुद्धिः, अनुभवः, ज्ञायते अनेन इति, प्रमाणम्** ( चवि. ४.७ ) **आत्मज्ञानम्** ( सुशा. १.१८ ) **तत्त्वावबोधः, मनोधर्मः** ( सुसू. ३६.६ )
बुद्धि, अनुभव, ज्याने जाणले जाते ते प्रमाण ( आत्मज्ञान; ) तत्त्व समजणे; मनाचा धर्म.
**आयुर्वेदः** ( च. सू. ३०.३१ ) आयुर्वेद.

**–चक्षुस्**–न., **ज्ञानार्थं ज्ञानरूपं वा चक्षुः** ( चसू. १.२८ ) **ज्ञानं चक्षुरिव, तत्त्वज्ञानम्** ( सुशा. ५.५० )
ज्ञानाकरिता किंवा ज्ञानरूप चक्षु. ज्ञान हे डोळ्यासारखे. तत्त्वज्ञान.

**–वती**–वि., **विदुषां परिषद्** ( चवि. ८.२० )
विद्वानांची सभा, परिषद्.

**–समुदाय**–पु., **प्रमाणसंघातः** ( चवि. ४.५ )
प्रमाणसमूह.

**ज्ञापक**–वि., **आवेदकः, ज्ञापयति निवेदयति निदानाद्यवस्थां सूचयति इति ज्ञापकः** ( अहसू. १.२९ )
समजून सांगणारा, निदानादि अवस्था सुचवणारा.

**ज्ञेय**–वि., **मनोज्ञेयम्, इन्द्रियनिरपेक्षतया ग्राह्यम्** ( चशा. १.२० )
मनाला जाणण्या सारखे, इंद्रियांव्यतिरिक्त झालेले, घेतलेले.

**ज्यायस्त्व**–न., **बृहत्त्वम्, अप्रशस्तगुणबृहत्त्वम् अप्रशस्तगुणप्रकर्षशालित्वं वा** ( चसू. २५.४२ )
मोठेपणा. अप्रशस्त गुणप्रकर्षाने असणे.

**ज्येष्ठबला**–स्त्री., **वनस्पति० महाबला** ( रा. ४.४२४ )
मोठी बला, मुद्रिका.

**ज्येष्ठा**–स्त्री., **वनस्पति० त्रिफला** ( र. २५.१०५ ) त्रिफळा.

**–मालक**–पु., **वनस्पति० निम्बः** ( रा. ९.४४ ) निंब.

**ज्योतिष्क**–पु., **वनस्पति० चित्रकः** ( ध. २.८० ) ( सुचि. ९.१० ) चित्रक.

**( ज्योतिष्का )**–स्त्री., **वनस्पति० मेथिका** ( ध. ६.१११ ) मेथी.

**ज्योतिष्मती**–स्त्री., **वनस्पति० शिरोविरेचनोपगगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१३ ) ( सुसू. ३९.६ ) **ज्योतिष्मतीक्षीरं विरेचनार्थमुपयुज्यते** (असंसू. १४) **गुणाः–तिक्ता, कटुी, उष्णा, रूक्षा, सरा, वमनी, दीपनी, बुद्धिमेधास्मरणकृत्, विरेचनी, वर्णकरी, दाहकरी, कफवातघ्नी च** ( ध.१.२६८ )

हिं.—मालकांगनी.

म.—मालकांगोणी.

गु.—मालकांकणी.

बं.—लताफटकी.

ता.—वावजी.

फा.—काल.

मालकांगोणी—डोक्याचे रेचक म्हणून असलेल्या गणातील. गुण—कडु, तिखट, उष्ण, रूक्ष, सारक, वामक, अग्निदीपक, विचारशक्ति व स्मरणशक्ति वाढवणारी रेचक, कफवातघ्न, वर्ण सुधारणारी, दाहकर.

कटभी ( ध. १.२६७ ) मालकांगोणी, विष्णुक्रांता.

काकमर्दनिका ( सुसू. ४२.११ ) एक वनस्पती.

**(ज्योतिर्) लता**—स्त्री., वनस्पति० ज्योतिष्मती ( रा. ३.३९५ ) मालकांगोणी.

**(ज्योतिष्) काया**—स्त्री., वनस्पति० ज्योतिष्मती ( ध. १.२६७ ) मालकांगोणी.

**ज्योतिस्**—स्त्री., अग्निः, तेजः, पञ्चमहाभूतेष्वेकं द्रव्यम् ( चसू. ८.९ ) सकलशरीरान्तर्गतं तेजः ( चइं. ११.३ )

अग्नि, ज्योती, ज्योत, तेज, पंचमहाभूतांपैकी एक, सर्वशरीरान्तर्गत तेज.

पित्तम् ( सुनि. २.२५–२६ ) पित्त.

अग्निशिखा ( सुचि. २४.९६ ) ज्वाला, ज्योत.

तारका ( सुचि. २४.९६ ) तारका, तारे.

वनस्पति० वनमेथिका ( रा. ५.१८४ ) रानमेथी.

**(ज्योती)-रथ** पु., निर्विषसर्प० ( सुक. ४.३४ (४) एक बिनविषारी सर्प.

**—रस**—पु., रत्न० ( इन्दु असंचि. ६ ) चंद्रकांत मणी.

**ज्योत्स्ना**—स्त्री., चन्द्रिका, तद्गुणाः—मधुरशीतला ( असंसू. १२ ) चांदणे. गुण—गोड, थंड.

**ज्योत्स्नी**—स्त्री., वनस्पति० पटोलः (रा. ३.७४) पडवळ.

**ज्वर**—पुं., रोग० रसप्रदोषजरोगेष्वेको व्याधिः ( चसू. २८.९ ) 'ज्वर संतापे' ज्वरयति संतापयति शरीराणीति ज्वरः ( चनि. १.३५ ) संतापात्मा व्याधिः, "ज्वरो रोगपतिः पाप्मा मृत्युरोजोऽशनोऽन्तकः । क्रोधो दक्षाध्वरध्वंसी रुद्रोर्ध्वनयनोद्भवः । जन्मान्तयोर्मोहमयः सन्तापात्माऽपचारजः । नानायोनिषु विविधैर्नामभिर्जायते ॥" ( अहनि. २.१–२ ) यथा दान्तिशरीरे पाकलो नाम ज्वरः, अश्वशरीरेऽभितापकः, गोशरीरे गोकर्णकः, पक्षिशरीरे मकरः, श्वशरीरे अलर्कः, ( मत्स्येष्विन्द्रमदः, ओषधीषु ज्योतिः, धान्येषु चूर्णकः ) अप्सु नीलिका, मानुषेषु ज्वरः इति । सर्वे प्राणभृतः सज्वरा इव जायन्ते म्रियन्ते स महामोहस्तदभिभूता देहिनः प्राग्देहिकं कर्म न स्मरन्ति । सर्वप्राणिनां च ज्वर एवान्ते प्राणानादत्ते । देहेन्द्रियमनस्तापकरः प्रज्ञाबलवर्णहर्षोत्साहह्रासकरः श्रमक्लममोहाहारोपरोधसंजननः ।

**ज्वरोत्पत्तिः**—द्वितीये युगे वर्षाणां सहस्रमक्रोधव्रतमास्थितं शर्वमसुरा अभिदुद्रुवुः । समर्थोऽपि दक्षः प्रजापतिस्तानसुरान्न निवारितवांस्तथैव स्वीये यज्ञे माहेश्वरं भागं न कल्पितवान् । अथोत्तीर्णव्रतः शिव एतादृशं दक्षव्यतिक्रमं बुद्ध्वा क्रुद्धो ललाटे चक्षुः सृष्ट्वा तानसुरान् दग्ध्वा दक्षयज्ञमप्यनाशयत् । स एव रुद्रक्रोधो ज्वर इति नाम्ना लोके प्रसिद्धिमगमत् ( चचि. ३.१५–२५ ) दक्षावमानेन क्रुद्धस्य रुद्रस्य निःश्वासात् ज्वरसंभव इति तन्त्रान्तरम् ।

हेतुः संप्राप्तिश्च—मिथ्याहारादिभिः कुपितो वातादिदोषः प्रविश्याऽऽमाशयमूष्मणा सह मिश्रीभूयाऽऽद्यमाहारपरिणामधातुं रसनामानमन्ववेत्य रसस्वेदवहानि स्रोतांसि पिधायाग्निमुपहत्य पक्तिस्थानादूष्माणं बहिर्निरस्य केवलं शरीरमनुप्रपद्यते तदा ज्वरमभिनिर्वर्तयति (चनि. १.२०) **संख्या**—अष्टविधा ज्वराः तत्र दोषैः सप्तधा अष्टमश्चाऽऽगन्तुः । **विधिभेदाः**—१ शारीरमानसश्चेति द्विविधः । २ सौम्यश्चाग्नेयश्चेति द्विविधः । ३ अन्तर्वेगबहिर्वेगश्चेति द्विविधः । प्राकृत-वैकृतश्चेति द्विविधः । ५ साध्यासाध्यश्चेति द्विविधः । ६ दोषकालबलाऽबलात् पञ्चविधः । ७ सप्तधातुगतत्वात् सप्तविधः । **ज्वरसामान्यलक्षणम्**—स्वेदावरोधः संतापो युगपत् सर्वाङ्गग्रहणं च यत्र रोगे दृश्यते स ज्वरो व्यपदिश्यते ( मा. २ ) **पूर्वरूपाणि**—श्रमोऽरतिर्विवर्णत्वं वैरस्यं नयनप्लवः शीतवातातपादिषु इच्छाद्वेषौ जृम्भाऽङ्गमर्दो गुरुता रोमहर्षोऽप्रहर्षः । एतानि पूर्वरूपाणि भवन्ति ( मा. १ )

**वातज्वरस्य लक्षणानि**—विषमारम्भविसर्गित्वम् ऊष्मणो वैषम्यं तीव्रतनुभावानवस्थानानि ज्वरस्य जरणान्ते दिवसान्ते निशान्ते धर्मान्ते वा ज्वरस्याभ्यागमनमभिवृद्धिर्वा विशेषेण परुषारुणवर्णत्वं नखनयनवदनमूत्रपुरीषत्वचामत्यर्थं क्रूसीभावश्च; अनेकविधोपमाश्चलाचलाश्च वेदनास्तेषां तेषामङ्गावयवानां; तद्यथा—पादयोः सुप्तता पिण्डिकयो-

रुद्वेष्टनं जानुनोः केवलानां च सन्धीनां विश्लेषणम् ऊर्वोः सादः, कटीपार्श्वपृष्ठस्कन्धबाहंसोरसां च भग्नरुग्णमृदितमथितचटितावपाटितावनुन्नत्वमिव, हन्वोः स्वव्यापाराकरणम्, स्वनश्च कर्णयोः, शङ्खयोर्निस्तोदः, कषायास्यता आस्यवैरस्यं वा, मुखतालुकण्ठशोषः पिपासा, हृदयग्रहः, शुष्कच्छर्दिः, शुष्ककासः, क्षवथूद्गारविनिग्रहोऽन्नरसखेदः, प्रसेकारोचकाऽविपाकाः, विषादजृम्भाविनामवेपथुश्रमभ्रमप्रलापप्रजागररोमहर्षदन्तहर्षाः, उष्णाभिप्रायता, निदानोक्तानामनुपशयो विपरीतोपशयश्चेति। **पित्तज्वरस्य लक्षणानि**–युगपदेव केवले शरीरे ज्वरस्याभ्यागमनमभिवृद्धिर्वा भुक्तस्य विदाहकाले मध्यन्दिनेऽर्धरात्रे शरदि वा विशेषेण कटुकास्यता घ्राणमुखकण्ठौष्ठतालुपाकस्तृष्णा, मदो भ्रमो मूर्च्छा पित्तच्छर्दनमतीसारोऽन्नद्वेषः; सदनं स्वेदः प्रलापो रक्तकोठाभिनिर्वृत्तिः शरीरे हरितहारिद्रत्वं नखनयनवदनमूत्रपुरीषत्वचामत्यर्थमूष्मणस्तीव्रभावोऽतिमात्रं दाहः शीताभिप्रायता, निदानोक्तानुपशयो विपरीतोपशयश्चेति; **श्लेष्मज्वरस्य लक्षणानि**–युगपदेव केवले शरीरे ज्वरस्याभ्यागमनमभिवृद्धिर्वा भुक्तमात्रे पूर्वाह्णे पूर्वरात्रे वसन्तकाले वा विशेषेण, गुरुगात्रत्वमनन्नाभिलाषः श्लेष्मप्रसेको मुखमाधुर्यं, हृल्लासो, हृदयोपलेपः स्तिमितत्वं, छर्दिर्मृद्वग्निता, निद्राधिक्यं स्तम्भस्तन्द्रा कासः श्वासः प्रतिश्यायः शैत्यं, श्वैत्यं च नखनयनवदनमूत्रपुरीषत्वचामत्यर्थं च शीतपिडका भृशमङ्गेभ्य उत्तिष्ठन्ति, उष्णाभिप्रायता निदानोक्तानुपशयो विपरीतोपशयश्चेति। द्वन्द्वजाः–**वातपित्तज्वरलक्षणानि**–तृष्णा मूर्च्छा भ्रमो दाहः स्वप्ननाशः शिरोरुजा, कण्ठाऽऽस्यशोषो, वमथू रोमहर्षोऽरुचिस्तमः पर्वभेदो जृम्भा च। **वातकफज्वरलक्षणानि**–स्तैमित्यं पर्वणां भेदो निद्रा, गौरवं, शिरोग्रहः, प्रतिश्यायः, कासः, स्वेदाऽऽप्रवर्तनं संतापो मध्यवेगश्च। **पित्तकफज्वरलक्षणानि**–लिप्ततिक्ताऽऽस्यता, तन्द्रा मोहः कासोऽरुचिस्तृषा मुहुर्दाहो, मुहुः शीतं च। **सान्निपातिकज्वरलक्षणानि**–क्षणे दाहः, क्षणे शीतमस्थिसन्धिशिरोरुजा सास्रावे कलुषे रक्ते निर्भुग्ने चापि लोचने सस्वनौ सरुजौ कर्णौ कण्ठः शूकैरिवावृतः तन्द्रा मोहः प्रलापः कासः श्वासोऽरुचिर्भ्रमः परिदग्धा खरस्पर्शा च जिह्वा कफमिश्ररक्तपित्तस्य ष्ठीवनं परं स्रस्ताङ्गता शिरसो लोठनं, तृष्णा, निद्रानाशो, हृदि व्यथा स्वेद–मूत्र–पुरीषाणां चिराद्दर्शनमल्पशः कृशत्वं नातिगात्राणां प्रततं कण्ठकूजनं कोठानां श्यावरक्तानां मण्डलानां दर्शनं मूकत्वं स्रोतसां पाको गुरुत्वमुदरस्य च। चिरात्पाकश्च दोषाणामिति सन्निपातज्वराकृतिः ( माज्वर. )

**निदाने त्रयोदशसन्निपातभेदाः**–सन्धिकाऽन्तक–रुग्दाह–चित्तभ्रम–शीताङ्ग–तन्द्रिक–कण्ठकुब्जकर्णक–भुग्ननेत्र–रक्तष्ठीवि–प्रलापक–जिह्वकाऽभिन्यासा इति त्रयोदशेभ्यो व्यतिरिक्तो हरिद्रकः इति संनिपातज्वरः। **विधिभेदेन शारीरमानसौ**–( १ ) शारीरो ज्वरः पूर्वं देहे जायते ततश्च मनसि मानसो ज्वरः पूर्वं मनसि पश्चात् देहे जायते इति विशेषः तत्र मनसि वैचित्त्यमरतिर्ग्लानिरिति मनस्तापलक्षणं तथैवेन्द्रियाणां वैकृत्यं च

**सौम्याग्नेयज्वरौ**–केवलवातारब्धः केवलकफारब्धस्तथा वातकफात्मकश्च ज्वरः सौम्यस्वभावः स सौम्यत्वेनोष्णमिच्छति, केवलपित्तात्मको वातपित्तात्मकश्च ज्वर आग्नेयः स शीतमिच्छतीति विशेषः वायुः परं योगवाहः सतु संयोगादुभयार्थकृत् तेजसा युक्तः दाहकृत् सोमसंश्रयात् शीतकृच्च

( चचि. ३.३८ )

**अन्तर्वेगस्य ज्वरस्य लक्षणानि**–अन्तर्दाहोऽधिकस्तृष्णा, प्रलापः श्वसनं, भ्रमः। सन्ध्यस्थिशूलमस्वेदो, दोषवर्चो विनिग्रहः। **बहिर्वेगस्य ज्वरलक्षणानि**–बाह्यः संतापोऽभ्यधिकस्तृष्णादीनां मार्दवं सुखसाध्यत्वं च। शीतपूर्वज्वरः–त्वक्स्थौ श्लेष्मानिलावादौ शीतं जनयतः तयोः प्रशान्तयोरन्ते पित्तं दाहं करोतीति शीतपूर्वः। यदा त्वक्स्थं पित्तमादावतीव दाहं करोति श्लेष्मानिलावन्ते शीतं कुरुतस्तदा दाहपूर्वो ज्वरः। एतयोर्ज्वरयोः दाहपूर्वः कृच्छ्रसाध्यः ( सुउ. ३९.५९–६१ )

दोषकालबलाबलात् पञ्चविधज्वरास्ते च संततः सततोऽन्येद्युष्कस्तृतीयकश्चतुर्थकश्चेति

( मा. ज्वर. ३१ )

**प्राकृतवैकृतज्वरौ**–कालस्वभावप्रकुपितो दोषः प्रकृतिरुच्यते तज्जातीयाच्च दोषादुद्भूतो ज्वरः प्राकृत उच्यते। कालप्रकृतिमुद्दिश्य निर्दिष्टः प्राकृतो ज्वरः वर्षाकालप्रकृतिभूतेन वातेन कृतो ज्वरः प्राकृतः स्यात् ( चक्र. ) वर्षासु वातज्वरः प्राकृतः शरदि पित्तज्वरः प्राकृतः वसन्ते च कफज्वरः प्राकृतः। ( अरुण. )

एभ्योऽन्यश्च ज्वरः वैकृतो ज्वरो दुःसाध्यः, परन्तु वातजन्यः प्राकृतो ज्वरोऽसाध्य एव । साध्यासाध्यज्वरौ बलवत्स्वल्पदोषेष्वनुपद्रवो ज्वरः साध्यो, बहुभिर्बलिभिर्हेतुभिर्जातो बहुलक्षणः, शीघ्रमिन्द्रियनाशनो यो ज्वरः स प्राणान्तकृद्-साध्यश्च । सप्रलापभ्रमश्वासस्तीक्ष्णो वातोत्तरो ज्वरः सप्ताहान्नरं हन्ति । एवं पित्तोत्तरो ज्वरः दशाहात् कफोत्तरश्च द्वादशाहान्नरं हन्ति । धातुगतज्वराः १) रसगतज्वरलक्षणानि–गुरुता, हृदयोत्क्लेशः, सदनं, छर्दिः, अरोचको, दैन्यमिति । २) रक्तगतज्वरलक्षणानि–रक्तनिष्ठीवनं, दाहो, मोहश्छर्दनं विभ्रमः, प्रलापः, पिडका, तृष्णेति । ३) मांसगतज्वरलक्षणानि–पिण्डिकोद्वेष्टनं, तृष्णा, सृष्टमूत्रपुरीषता, ऊष्माऽन्तर्दाह-विक्षेपो, ग्लानिरिति । ४) मेदोगतज्वरलक्षणानि–भृशं स्वेदस्तृषा, मूर्च्छा, प्रलापश्छर्दिर्दौर्गन्ध्य-मरोचको, ग्लानिरसहिष्णुतेति । ५) अस्थिगत-ज्वरलक्षणानि–अस्थ्नां कूजनं, श्वासो, विरेकश्छर्दि-र्गात्राणां विक्षेपणमिति । ६) मज्जागतज्वरलक्षणानि–तमःप्रवेशो, हिक्का, कासः, शैत्यं, वमिरन्तर्दाहो महाश्वासो मर्मच्छेद इति । ७) **शुक्रगतज्वर-लक्षणानि**–शेफसः स्तब्धता, शुक्रस्य मोक्ष इति । **सामज्वरलक्षणानि**–लालाप्रसेको, हृल्लासो, हृदयाशुद्धिररोचकस्तन्द्राऽऽलस्यमविपाक आस्य-वैरस्यं, गुरुगात्रता, क्षुन्नाशो बहुमूत्रत्वं, स्तब्धतेति। **निरामज्वरलक्षणानि**–क्षुत्क्षामता, गात्राणां लघुत्वं, ज्वरमार्दवं, दोषप्रवृत्तिरष्टाह इति । **पच्यमानज्वरलक्षणानि**–अधिकज्वरवेगस्तृष्णा प्रलापः, श्वसनं, भ्रमो, मलप्रवृत्तिरुत्क्लेश इति । **ज्वरमोक्षलक्षणानि**–स्वेदो, लघुत्वं, शिरसः कण्डूर्मुखस्य पाकः, क्षवथुरन्नलिप्सेति । **ज्वर-मुक्तलक्षणानि**–दाहः, स्वेदो, भ्रमस्तृष्णा कम्पविड्भिदसंज्ञिता, कूजनमास्यवैगन्ध्यमिति । ( माज्वर. ) **आगन्तुज्वरः**–चतुर्विधः–अभिघात-जोऽभिषङ्गजोऽभिचारजोऽभिशापजश्च

१) **अभिघातजः**–शस्त्रलोष्टकशाकाष्ठमुष्टयरत्नि-तलद्विजैस्तद्विधैर्हते गात्रे स ज्वरोऽभिघातजः स्यात् । प्रायो वायू रक्तं प्रदूषयन् सन् सव्यथा-शोफवैवर्ण्यं सरुजं ज्वरं करोति । २) **अभिषङ्गजः**–कामशोकभयक्रोधैरभिषक्तस्य ज्वरो भूताभिषङ्गजश्च ज्वरोऽभिषङ्गजो ज्ञेयः । वायुः कामशोक-भयात्, कुप्यति पित्तं क्रोधात् कुप्यति, भूताभिषङ्गात् त्रयो दोषाः कुप्यन्ति । विषवृक्षानिलस्पर्शाद-भिषक्तस्याभिषङ्गजो ज्वरो भवतीत्येके । सिद्धानाम-भिचाराभिशापाभ्यां सुदुःसहः संनिपातज्वरो भवति; **कामज्वरे**–ध्याननिःश्वासबाहुल्यमस्ति, **शोकजे**–बाष्पबाहुल्यम्, **भयज्वरे**–त्रासप्रायत्वम्, **क्रोधजे**–बहुसंरम्भोऽस्ति, **भूतावेशे**ऽमानुषं लक्षणम्, **विषसंभवे**–मूर्च्छामोहमदग्लानिभूयिष्ठतेति विविधज्वरेषु लक्षणानि भवन्ति ( चचि. ३.११४–१२४ ) ज्वरे दोषपाचनार्थं ज्वरशमनार्थं च लङ्घनादि कर्तव्यम् । लङ्घनं स्वेदनं कालो यवाग्वस्तिक्तको रसश्चेति ज्वरकराणां दोषाणां पाचनानि स्युः । तानि च यथावस्थं क्रमशो वा प्रयोक्तव्यानि

( अहृचि. १.२१ )

**ज्वर**–ताप. रसदुष्टीने होणाऱ्या रोगापैकी एक विकार. शरीर तापवतो म्हणून ताप हे नाव. रोग-पति, पाप्मा इ० आणखीही नावे आहेत. यज्ञ-प्रसंगी दक्षाने अपमान केल्यामुळे शंकराला क्रोध आला असता त्याच्या ललाटातील तिसऱ्या डोळ्या-पासून याची उत्पत्ति झाली अशी पौराणिक कथा. जन्मकाळी व मृत्युसमयी मोह उत्पन्न करणारा, दुष्कृत्यापासून मनःसंतापस्वरूपात्मक असतो. स्थिर-चर सर्व योनीत हा होतो. उ०–**हत्तीला येणाऱ्या ज्वराला पाकल म्हणतात** घोड्याला **अभिताप**क गाई-बैलांना **गोकर्णक**, पक्ष्यांना **मकर**, कुत्र्यांना **अलर्क**, माशांना **इंद्रमद**, औषधींना **ज्योति, धान्याला चूर्णक**, पाण्याला **नीलिका** इ०. देह, इंद्रिये, मनाला तापदायक, बुद्धि, बल, वर्ण, हर्ष, उत्साह नष्ट करणारा, थकवा, ग्लानि, मोह, आणि आहार घेण्याची प्रवृत्ति बंद करणारा हा ज्वर आहे. **कारण** व **संप्राप्ति**–अहितकारक आहार-विहाराने दोष वाढून आमाशयात शिरतात; व तेथील पाचक अग्नि नष्ट करून ऊष्म्यासह त्या अग्नीला घेऊन रसधातूत जातात. त्यामुळे रसवह आणि स्वेदवह स्रोतसे बंद होतात व सर्व शरीरभर त्या अग्नीने दोषांचे पचन सुरू होते. ह्या घटनेत वाढलेली उष्णता व्यक्त होते तो ज्वर होय.

**संख्या व प्रकार**—तीन दोषांचा प्रत्येकी १ असे ३, दोन दोन दोषामुळे होणारे तीन, तीनही दोषाच्या वाढीने होणारा १, असे ७ प्रकार व आगंतु कारणाने होणारा १, असे ८ प्रकार मुख्य

संभवतात. यांना क्रमशः वात, पित्त, कफ, वातपित्त, वातकफ, पित्तकफ, संनिपात आणि आगंतु अशी नावे आहेत. या शिवाय सौम्य, आग्नेय, शारीर, मानस, अंतर्वेग, बहिर्वेग, प्राकृत, वैकृत, साध्य, असाध्य असे ५ भेद; त्याच प्रमाणे दोष आणि कालाच्या बलाबलामुळे पाच भेद संभवतात. तसेच रसादि सात धातूंच्या ठिकाणी होणारे रसगतादि सात प्रकार ज्वरांचे होऊ शकतात.

**सामान्यलक्षणे**–घाम बंद होणे, अग्नि मंद होणे, अंग तापणे व सर्वांग जखडणे ह्या गोष्टी एकाच वेळी संभवतात तेव्हा त्याला ज्वर म्हणतात.

**पूर्वचिन्हे**,-थकवा, अस्वस्थता, शरिराचा वर्ण बिघडणे, रुचि नष्ट होणे, डोळ्यात पाणी येणे, थंडी, वारा, ऊन ह्यांची घटकेत इच्छा व दुसऱ्या क्षणी तिटकारा वाटणे, जांभया, आंग दुखणे, जडत्व; आंगावर शहारे; अंधेरी येणे व आनंद नाहीसा होणे.

**वातज्वरलक्षणे**–ताप भरणे व निघण्याच्या बाबतीत अनियमितपणा, पचनानंतर, सायंकाळी, उत्तररात्री, ग्रीष्मऋतूच्या शेवटी ज्वर येतो किंवा वाढतो, शरिरावर तांबुस खरखरितपणा, नखे, डोळे, तोंड, मूत्र, मल आणि त्वचा यांच्या ठिकाणी अत्यंत रूक्षता व मलमूत्राची प्रवृत्ति न होणे, पाय बधिर होणे, पिंढ्यात पेटके येणे, गुडघे इ. सांधे ढिले झाल्यासारखे, मांड्या गळणे, कमर, बरगड्या पाठ, खांदे, हात, छाती यांचे ठिकाणी फुटल्यासारखी घुसळल्यासारखी, उपटल्यासारखी वगैरे प्रकारची पीडा, केव्हा होते केव्हा होत नाही. हनुवटीचे चलनवलन होत नाही, कानात आवाज, कानशिलात टोचणी, तोंड तुरट, बेचव, तोंड, टाळू, गळा सुकणे, तहान, हृदय जखडल्यासारखी पीडा, कोरडी वांती, कोरडा खोकला, शिंक किंवा ढेकर न येणे, अन्नावर इच्छा नसणे, तोंडाला पाणी सुटणे, अपचन, चित्त उद्विग्न, जांभया येणे, कंप, थकवा, भोवळ, बडबड, निद्रानाश, आंगावर रोमांच, दात शिवशिवणे, उष्ण पदार्थाची इच्छा, आणि वातवृद्धीची व ज्वराची जी कारणे घडली असतील त्यांचा त्रास आणि त्या विरुद्ध उपचारांनी बरे वाटणे.

**पित्तज्वरलक्षणे**–एकदमच सपाटून ताप भरणे, व वाढणे. जेवण पचत असतांना मध्यान्ह, मध्यरात्र ह्या वेळी व शरदृतूत येतो; तोंड कडु व तिखट होणे, नाक, तोंड, गळा, ओठ, टाळू यांचा दाह किंवा पुळ्या येणे, तहान, गुंगी, भोवळ, बेशुद्धि, पित्ताची वांती, अतिसार, अन्नद्वेष, ग्लानि, उद्विग्नता, बडबड, तांबडी चकंदळे उठणे, नख, डोळे, तोंड, मल, मूत्र, त्वचा हिरव्या किंवा पिवळ्या रंगाची होणे, भयंकर उष्णता व दाह, थंडपदार्थांची इच्छा होते.

**कफज्वरलक्षणे**–दिवसातून एकदा ज्वर येणे. वाढणे, जेवण होताच, पहाटे, पूर्वरात्री, व वसंत ऋतूत येणे, आंग जड वाटणे, अन्न नकोसे होणे, कफयुक्त थुंकी, तोंड गुळमट, उम्हासे येणे, हृदयाला लपेटल्यासारखे वाटणे, आंगाला ओले वस्त्र गुंडाळल्यासारखे वाटणे, ओकारी, अग्निमांद्य, झोप अधिक येणे, आंग ताठणे, झांपड, खोकला, श्वास, पडसे, थंडी वाटणे, नखे, डोळे, तोंड, मल मूत्र ह्यांचेवर पांढरेपणा, पांढऱ्या पुळ्या उठणे, आणि ऊन पदार्थांची इच्छा होणे. दोन दोन दोषांच्या मिश्रणाने येणाऱ्या ज्वराला संसर्गज म्हणतात. त्यात दोन दोषांची वरील मिश्र लक्षणे होतात व तीनही दोष वाढले तर सर्व दोषांची लक्षणे आढळतात. त्याला संनिपातज्वर म्हणतात.

दोषांच्या कमीअधिक वाढीला अनुसरून संनिपात ज्वर १३ प्रकारचा संभवतो. संधिक, अंतक, रुग्दाह इ. नावे त्याच्या विशेष लक्षणावरून दिली आहेत.

**भिन्नभिन्नदृष्टीने होणारे प्रकार**–

१ **शारीरज्वर**–आहार विहारामुळे शरिरात प्रथम विकृति उत्पन्न होऊन येणारा ज्वर. वर सांगितलेले वातपित्तादी.

२ **मानसज्वर**–निरनिराळ्या मानसिक कारणांनी मनात प्रथम विकृति होऊन नंतर शरिरावर परिणाम करणारा; यात चित्त स्थिर नसणे, व्याकुळता, निरुत्साह, थकवा इ. लक्षणे होतात. आणि त्या मानाने इंद्रियातही विकृति होते.

३ **सौम्य**–केवळ वात केवळ कफ किंवा दोघांच्याही मिश्रणाने होणारा ज्वर सौम्य म्हणजे साधारण भरतो, उष्णपदार्थांची इच्छा.

४ **आग्नेय**–केवळ पित्तदुष्टीने किंवा वातपित्त संमिश्र दुष्टीने होणारा ज्वर. यात थंड पदार्थांची इच्छा असते.

५ **अंतर्वेग**–अंतर्दाह, तृष्णा, बडबड, श्वास, भ्रम, सांधे व हाडे यात शूळ, घाम न येणे, मलमूत्रावरोध ही लक्षणे होतात.

हिर्वेग—यात बाह्य त्वचेचा दाह अधिक व इ. लक्षणे कमी प्रमाणात असतात यामुळे बरा होतो.

कृत—त्या त्या ऋतूच्या स्वभावानुसार दोषाने ा ज्वर प्राकृत ज्वर होय. जसे वर्षाऋतूत वर, शरदृतूत पित्तज्वर आणि वसंतऋतूत त्र हे सुखसाध्य पण वातज्वर प्राकृत ाचाही दुःसाध्य.

कृतज्वर—वरील प्रकाराच्या विरुद्ध होणारे सर्व वैकृतज्वर दुःसाध्य होत.

ासाध्यता—रोगी बलवान, दोषदुष्टी अल्प द्रव नसतील तर साध्य; परंतु अनेक बलवत्तर ांनी झालेला, पुष्कळ लक्षणयुक्त, आणि ज्यात ाश म्हणजे त्याची कार्यशक्ति नष्ट होते, र कमी होत जाते तो असाध्य.

ात्वे घातकता—वाताधिक संनिपात सात त, पित्ताधिक दहा आणि कफाधिक बारा ात प्राणनाश करतो.

पूर्वज्वर—त्वचेच्या ठिकाणी जेव्हा वात आणि ष वाढतात तेव्हा प्रथम थंडी येऊन त्यांचा ांत झाला व पित्ताचा वेग वाढला की दाह णे होतात. हा सुखसाध्य असतो.

पूर्वज्वर—या उलट त्वचेत प्रथम पित्त वाढले दाह इ. लक्षणे करून त्याचा वेग शांत झाल्या- डी वातकफाच्या वेगामुळे येते. हा कष्टसाध्य. आणि काल यांच्या बलाबलामुळे १ **संतत** ो सात, दहा, बारा किंवा यांहून अधिक दिवस ा राहणारा, २ **सततक** म्हणजे दररोज दोन ग्रेणारा, ३ **अन्येद्युष्क** म्हणजे दिवसातून एक ाणारा, ४ **तृतीयक** (तिजारे) तिसऱ्या दिवशी ा ५ आणि **चतुर्थक** (चौधारे) चवथ्या ा येणारा असे ५ प्रकार संभवतात.

ातुगत ज्वरही ७ प्रकारचे संभवतात.

लक्षणे :—

**ाधातुगतज्वर**—जडत्व, हृदयाचे ठिकाणी ळणे, आंग गळणे, वांती, अरुची आणि मनाची ा.

**क्तधातुगतज्वर**—थुंकीतून रक्त येणे, दाह, वांती, भ्रम, बडबड आंगावर पुळ्या उठणे, ान,

३ **मांसधातुगतज्वर**—पिंढऱ्यात गोळे येणे, तहान, मलमूत्रप्रवृत्ति अधिक, उष्णता, अंतर्दाह, मनाचा गोंधळ, आणि ग्लानि.

४ **मेदोगतज्वर**—अत्यंत घाम, तहान, मूर्च्छा, बडबड, वांती, शरिराला दुर्गंध, अरुचि, ग्लानि आणि सहनशक्तीचा अभाव.

५ **अस्थिगतज्वर**—हाडात आवाज, श्वास, रेच होणे, वांती, आणि हातपायादि अवयवांची आदळ आपट.

६ **मज्जागतज्वर**—अंधारात घुसल्यासारखे वाटणे, उचकी, खोकला, शैत्य, वांती, अंतर्दाह, आणि मर्म- स्थानी फुटल्यासारखी पीडा.

७ **शुक्रगतज्वर**—जननेंद्रिय ताठणे, व शुक्रस्राव होणे ही विशेष लक्षणे.

१ **सामज्वरलक्षणे**—लाळ गळणे, उम्हासे, हृदयाच्या ठिकाणी अशुद्धि, अरुचि, तंद्रा, आळस, झापड, अपचन, लघ्वी अधिक होणे आणि आंग ताठणे.

२ **पच्यमानज्वर**—म्हणजे दोषांचे पचन होत आले असता ज्वरात वेग वाढतो (ज्वर वाढतो) तहान, बडबड, श्वास, भ्रम, मलप्रवृत्ति (दोषरहित) मळमळ.

३ **निरामज्वरलक्षणे**—भूक वाटते, शरिराला हल- केपणा, ताप कमी होणे, आणि मलमूत्रातून पित्तदोष निघून जाणे. सामान्यतः आठवा दिवस तापाला होणे ही ताप निराम होण्याची मर्यादा असते.

**ज्वर जात असल्याची लक्षणे**—घाम, शरिराला हलकेपणा, डोक्यात खाजवू लागणे, तोंड येणे, शिंक येणे व खाण्याची इच्छा.

**ज्वर निघाल्याची लक्षणे**—दाह, घाम, भोवळ, तहान, कंप, मल पातळ होणे, घशात आवाज व तोंडाला घाण येणे.

आगंतुज्वर ४ प्रकारचा संभवतो. त्याची लक्षणे.

१ **अभिघातज**—शस्त्र, दगड इ० मार लागून वा पडल्यामुळे आघात होऊन ज्वर येतो. यात वायु रक्ताला दुष्ट करून पीडा, सूज, त्वचेचा रंग बदलणे ही लक्षणे उत्पन्न करतो.

२ **अभिषंगज**—कामविकार, शोक, भीति इ० मुळे वायु, क्रोधाने पित्त आणि भूतबाधा इ० प्रकारांनी तीनही दोष प्रकुपित होतात. यातील कामज्वरात

चित्ताची अस्थिरता, आळस, झापड, भूक नसणे इ०, **शोक**ज्वरात अश्रूंचा स्राव होत राहाणे, **भय**ज्वरात मन संत्रस्त होणे, **क्रोधज्वरात** मनाची खळबळ, कंप व भूतबाधेमुळे काही अतर्क्य चिन्हे उत्पन्न होतात. ३ **अभिचारज**–जारण मारणादि प्रयोगाने येणारा ज्वर आणि ४ **अभिशापज** ज्वर म्हणजे ऋषि मुनि इ० च्या शापाने आलेला ज्वर. ह्या दोन्ही प्रकारात मोह आणि तृष्णा ही मुख्य लक्षणे आढळतात. **उपचार**–प्रथम लंघन देणे, नंतर घाम येण्यासाठी शेक इ० उपचार करून दोष पचनासाठी ७ दिवस औषध देणे व क्रमाने पेज, अटवल इ० आहार व त्यातून किंवा औषधातून कडुरसाचा उपयोग करावा.

**–गजहरिरस**–पु., **पारदयोग० हिंगुलाभ्रकगंधकयुक्तः ज्वरघ्नः** ( र. १२.२२
पाऱ्याचा एक योग, हिंगुळ अभ्रक गंधकयुक्त ज्वरनाशक.

**–नाशिनी**–स्त्री., **वनस्पति० गुडूची** ( ध. १.२ )
गुळवेल.

**–हन्त्री**–स्त्री., **वनस्पति० मञ्जिष्ठा**
( ध. १–१७; रा. ६.१७ ) मंजिष्ठा.

**–हरगण**–पु., **पञ्चाशन्महाकषायवर्गेष्वेकः** ( चसू. ४.१६ ) **सारिवाशर्करापाठामञ्जिष्ठाद्राक्षापीलुपरूषकाभयामलकबिभीतकानि दश**
( चसू. ४.१६. )
ज्वरनाशक गण–अनंतमूळ, साखर, पहाडमूळ, मंजिष्ठा, द्राक्ष, पीलु, फालसा, हिरडा, आवळा, बेहडा ही दहा.

**ज्वराङ्कुश**–पु., **पारदयोग० गन्धकटङ्कणशंखभस्मादियुक्तः ज्वरघ्नः** ( र. १२.६०–६३ )
गंधक, टांकणखार, शंखभस्म, इत्यादियुक्त पाऱ्याचा योग. ज्वरनाशक.

**ज्वरान्तक**–पु., **वनस्पति० नेपालनिम्बः**
**द्र० किराततिक्तः** ( ध. १.३३; रा. ९.५२ )
नेपाळनिंब.
**आरग्वधः** ( ध. १.२१९ ; रा. ९.३३३) आधाडा.

**ज्वरारि**–पु., **वनस्पति० गुडूची** ( ध. १,१ रा. ३.१ )
गुळवेल.

**ज्वलदौषधि**–स्त्री; **वनस्पति० या रात्रौ ज्वलन्ती दृश्यते** ( र. १.११–१४ )
जळती–चमकणारी औषधी तृणज्योति, नीलज्योति, काष्ठज्योति इ०.

**ज्वलन**–पु., **अग्निः ज्वलति दीप्यति इति 'ज्वलनः** ( चसि. ३.६४ अहसू. १८.६० ) अग्नि, विस्तव.

**( ज्वलनी )** स्त्री., **वनस्पति० गन्धपलाशः** ( ध. १.६५ )
कचोऱ्याचा प्रकार. पानासुद्धा खूप वास येणारी लांब पानांची कडु कंदाची प्रकाशमान वनस्पती.
**मूर्वा** ( रा. ३.११ ) मोरवेल.

**ज्वलनाभ**–न., **वनस्पति० आलकम्** ( ध. १–८९ )
सालवणीचा प्रकार, चमकणारी वनस्पती.

**ज्वलित**–पु., **अग्निः** ( र. १५.६९ ) अग्नि, विस्तव.
वि., **दीप्त** ( र. १५.६९ ) पेटलेला.

**ज्वाला**–स्त्री., **अग्निज्वाला** ( चचि. ३.२३–२४ )
ज्वाला, जाळ, विस्तवाचा जाळ.

**–मालाकुल**–वि., **ज्वालाव्याप्तः क्रोधाग्निर्ज्वररूपः**
( चचि. ३.२३–२४ )
सर्वत्र जाळाने व्यापलेला, ज्वररूपी क्रोधाग्नि.

**–मुखी**–**वनस्पति०** स्त्री., **ज्वालासमपुष्पी, लाङ्गली**
( र. २०.२६ )
ज्वालेसारख्या फुलांची कळलावी.
**चित्रकः**, ( र. १२.१२१–२२ ) चित्रक.
**वन्या क्षुद्रफला जम्बूः** ( र. ४.६७–६८ )
रानजांभूळ. लहान जांभूळ.

## झ

**झण्टी**–स्त्री., **धान्य०** (ड) सुसू. ४६.२१ ) एक धान्य.

**झण्डु**–पु., **वनस्पति० स्थूलपुष्पा, कटुः कषायो ज्वरभूतग्रहापहः** ( रापरि. ५.५२ )
हिं.—लालमुरगा.
**म.—झेंडू.**
गु.—मुखमल. गलगोटो.
फा.—काजेखरूस.
झेंडू, गेंद असलेला, मोठ्या फुलांचा, **गुण**–तिखट तुरट ज्वर भूतबाधा ग्रहबाधा नाशक.

**झण्डूक**–पु., **वनस्पति० झण्डुः**
( रापरि. ५.५२ ; ३४४ ) झेंडू.

**झरत्कोष्ठी**–स्त्री., **कोष्ठीविशेषः आसवादिनिर्माणे उपयुक्ता कोष्ठी** ( र. ७. ५–६ )
आसवादि करण्याला उपयुक्त कोठी, रांझण, माठ, बरणी इ०.

**–शब्द**–पु., **ज्वालायाः शब्द इव शब्दः, ज्वालायाः पाचकस्य जाठरानलस्य वा शब्दः** ( चइ. ४.२० )

जाळ होत असताना जो शब्द होतो तसा शब्द भुकेच्या वेळी पाचकाग्नीचा पोटात होणारा शब्द.

**झर्झर**–न., यष्टि० खरखरकः ( चक्र. ) **पन्नगभयनाशनार्थं झर्झरपाणिना भवितव्यम्** ( चचि. २३.२५० ) **झनझणायमानं लोहमयं कटकाकारम्** ( इन्दु ) असंउ. ४२ )

काठी; आवाज करणारी. घुंगरू लावलेली. जवळपास असलेला सर्प आवाजाने पळून जावा म्हणून जवळ बाळगावयाची ही काठी. झणझण आवाज होणारे लोखंडाचे कडे.

**झर्झरीकृत**–वि., ईषत्पिष्टम् ( र. ५.२४० )

थोडे कुटलेले. आधकूट. अर्धे बोबडे.

**झषा**–स्त्री., वनस्पति० गाङ्गेरुकी ( ध.१.२८४ )

मोठ्या पानांची लांब शाखांची वला.

**झिञ्झिणी**–स्त्री., वनस्पति० जिङ्गिनी ( ध. ३.२२ )

पर्वतात होणारी मंजरी असलेली वनस्पती.

**झिञ्झिरीटा**–स्त्री., वनस्पति० कण्टफली, पीतपुष्पा च, गुणाः–कटुका, कषाया, शीता, वृष्या, संतर्पणी, बल्या, महिषीवृक्षवर्धिन्यतिसारजित् ( रा. ४.२८.५३ )

पिवळ्या फुलांची लव काटे असलेल्या गोलफळांची वनस्पती. झिंझुरटी. बलेचा प्रकार. **गुण**–तिखट तुरट गोड थंड पौष्टिक बलकर शुक्रधातूला हितकर अतिसारनाशक.

**झिण्टि**–स्त्री., धान्य० श्यामाकसदृशी कषायमधुरवातलशीतत्वादिगुणा ( चसू. २७.१८ )

वऱ्याच्या तांदुळासारखे धान्य, एक भगर. तुरट गोड थंड वातुळ इ०

**झिण्टिका**–स्त्री., वनस्पति०, गुणाः–कटुका, तिक्ता, वातकफघ्नी, दन्तामयशूलशोफकासत्वग्दोषविनाशिनी च ( रा. १०.४२१ ध. १.२७८ )

निळी कोऱ्हांटी. **गुण**–तिखट कडु वातकफनाशक दंतरोग शूल सूज खोकला नाशक. त्वचारोगनाशक.

**झिण्टी**–स्त्री., वनस्पति० कुरण्टः ( ध. १.२७८ रा. १०.४१९ )

निळी कोऱ्हांटी.

**झिरिण्टिका**–स्त्री., वनस्पति० कुटुम्बिनी ( रा. परि. ५.२१ )

पाण्यात होणारी दुधाळ वनस्पती.

**झुञ्झु**–पु., वनस्पति० झुञ्झुरकः ( अहसू. ६.९४ )

एक वनस्पती.

**झेण्डूक**–पु., वनस्पति० झण्डुः (रा. परि. ५.५२) झेंडू.

# आयुर्वेदीय - शब्दकोशः

## ट



**टङ्क**–पु., वनस्पति० नीलकपित्थकः
( ध. ५.११ रा. ११.९ ) उत्कृष्ट आंबा.
राजाम्रः ( ध. ५.११ ) उत्कृष्ट आंबा.
क्षार०, टंकणः ( र. ५.२१ ) टाकणखार.
न., वनस्पति० कपित्थभेदः, नीलकपित्थवृक्षः ( सुसू. ४६.१९२ ) कवठाचा प्रकार. निळे कवठ.
काश्मीरप्रसिद्धं फलम् (चसू.२७.१३६) (र. २०. ४१–४२ ) काश्मीरमध्ये प्रसिद्ध फळ.
**–भसित**–न., कपालभृष्टं शुद्धं टङ्कणम् (र. १६.११८) खापरात भाजलेला टाकणखार, लाही, शुद्ध टाकणखार.

**टङ्कण**–पु., भैषज्य० टंकणक्षारः ( ध. २.२२ ) टाकणखार.
श्वेतटङ्कणम् ( ध. २.२२. रा. ६.३१ ) पांढरा टाकणखार.
सौभाग्यम् ( र. २०.२१ ) तेल्या टाकणखार.
**–क्षार**–पु., भैषज्य० टङ्कणः (ध. २.२२) गुणाः–कटुरुष्णः, पित्तकरो, दीपनः, कफवातहरः, स्थावरविषकासश्वासहरश्च । टांकणखार.
हिं.—सुहागा.
**म.—टांकणखार.**
गु.—टंकणपाढियो.
बं.—सौहागा.
ता.—एलिगारम्.
फा.—तीगार.
**गुण**–तिखट, उष्ण, पित्तकर, अग्निदीपक, कफवातहर, वनस्पतिज इ. विषे, खोकला, श्वासनाशक.

**टिण्टिकेर**–न., वनस्पति० करीरफलम् ( चक्र. चचि. १४.१० ) नेवती, नेवतीचे फळ.

**टिण्टुक**–पुं., वनस्पति० स्योनाकः, टिण्टुकस्य मूलं ग्राह्यम् ( ध. १.११५ ) दशमूलेष्वेकम् ( सुसू. ३८.६८–६९) गुणाः–तिक्तः, शीतलः, पित्तश्लेष्मवातघ्नो बस्तिरोगाऽऽमवातातीसारकासारुचिसंनिपातज्वरघ्नश्च तत्फलगुणाः–कटुलवणाम्लमुष्णं लघु, दीपनं, पाचनं, हृद्यं, रुचिकृत्, कफवातहरम् ( ध. १.११५ रा. ९.१४४–४५ )
हिं.—सोनापाठा.
**म.—टेंटु**, खारासिंगा.
गु.—अरलू.
बं.—सोनागाछ.
ता.—पन.
**टेंटु**–याचे मूळ उपयुक्त; दशमूळात हे आहे. **गुण**–कडु, थंड, पित्तकफवातघ्न. आमवात, अतिसार, बस्तिरोग, खोकला, चव नसणे, सन्निपातज्वरनाशक. **फळ**–तिखट, खारट, आंबट, उष्ण, हलके, दीपक, पाचक, रुचिकर, हृदयाला हितकर, कफवातहर.

**टीका**–स्त्री., व्याख्यानरूपा वृत्तिः ( र. २०.२२२ ) टीका विस्तृत विवेचन. विधानांची वाढ, स्पष्टीकरण, बोधक विवरण.

**टुण्टुक**–न., वनस्पति० टिण्टुकः ( चचि. २३.७० ) ( सुचि. ३१.५ ) टेंटु.

**टेण्टूक**–पु., वनस्पति० पृथुशिम्बः ( रा. ९.१४१ ) टेंटु.

## ड

**डङ्गरी**–स्त्री., वनस्पति० ( ध. १.१८१ ) त्रपुसभेदः, ( ध. १.१८१ ) गुणाः–शीतला, रुच्या, दाहपित्तास्रदोषजित्, शोषहृत्तर्पणी, गौल्या, जाड्यहा, मूत्ररोधनुत्; बालं डाङ्गरिकं फलं सुमधुरं शीतं रुचिकरं संतर्पणं पुष्टिदं बल्यं वीर्योन्मेषकरं पित्तापहं तृष्णादाहनिबर्हणं भ्रान्तिश्रमध्वंसनं तदेव पक्वं मधुरं गुरु तृड्दाहरक्तघ्नम् ( रा. १.२६८ )
**लाल भोपळा** डांगर. **गुण**–गोड, रुचकर, जाड्य, मूत्राचा अवरोध, दाह, रक्तस्राव, क्षयनाशक. हृदयाला पौष्टिक. **कोवळे फळ**–वरील गुणांचे शिवाय भ्रांति थकवा नाहीशी करून बलकर वीर्यवर्धक तृप्तिकर आहे. तेच **पक्व**-जड तहान रक्तविकार नाशक.

**डमरुकाख्ययन्त्र**–न., यन्त्र० यन्त्रस्याधस्तादग्निः कार्यः, एतद्यन्त्रं डमरुकाख्यं पारदभस्मकर्मण्युपयुज्यते; एकस्यां रसयुक्तायां स्थाल्यामन्यां न्युब्जां स्थालीं स्थापयित्वा तन्मुखरंध्रं निरुध्य यज्जायते तत् ( र. ९.५८ )

डमरु यंत्र. डमरूसारखे एका थाळीत पारा व भस्म करणारी द्रव्ये एकत्र करून ठेवावी; वर दुसरी थाळी पालथी झाकावी; संधिलेप करून, पाऱ्याच्या खाली योग्य अग्नि द्यावा. पाऱ्याच्या भस्माला उपयुक्त.

**डम्बरिन्**–स्त्री., वि., स्तब्धाक्षावलोकी, संरम्भवान् ( चक्र. ) डम्बरी कुपितोच्छ्वासः प्रत्याख्येयो विजानता ( चइ. ६.१९ )
**डम्बरः संरम्भो गुरुस्तिमिताक्षत्वं वा, तद्वान् डम्बरी** ज्याच्या डोळ्याना सूज किंवा ते ताठरलेले असतात तो. श्वास लागला असेल तर असाध्य म्हणून उपचार करावा.

**डह्लण**–पु., समस्तजनपदतिलककल्पे श्रीभादानकदेशे नगरीवरमथुरासमीपेऽङ्कोलानामकं वैद्यस्थानमस्ति, यत्र सौरवंशजा ब्राह्मणाः समस्तभूपतिमान्याऽश्विनीकुमारसमानाः पार्वणचन्द्ररुचिरयशःप्रसाधितदिङ्मण्डला वैद्या अभूवन्; तदन्वये गोविन्दनामा चिकित्सकशिरोमणिरभूत्। ततस्तत्पुत्रो भिषक्शिरोमुकुटमणिर्जयपालः संजातः। तत्तनयश्च समस्तशास्त्रार्थतत्त्वज्ञो भरतपालः संजातः; तत्पुत्रः स्वकुलनभस्तलचन्द्रमा विवेकबृहस्पतिः श्रीसहपालदेवनृपतिवल्लभः श्रीडह्लणः समभूत्, तेन श्रीजेज्जटं टीकाकारं श्रीगयदासभास्करौ च पञ्जिकाकारौ श्रीमाधवब्रह्मदेवादीन् टिप्पनकारांश्चोपजीव्याऽऽयुर्वेदशास्त्रसुश्रुतव्याख्यानाय निबन्धसंग्रहः क्रियते ( सुसू. १.१ )

भादानक देशात मथुरेच्या जवळ अंकोला नावाच्या वैद्यांच्या गावात सौरवंशी ब्राह्मणात अश्विनीकुमारासारखे पौर्णिमेच्या चंद्रासारखे यश असलेले वैद्य होते; त्यानंतर गोविंद नावाचे चिकित्सकशिरोमणि होते; त्याचे पुत्र जयपाल त्यांचे पुत्र भरतपाल होत. व त्यांचे सुपुत्र डल्हण होत. त्यांनी सुश्रुतावर निबंधसंग्रह नावाची टीका केली.

**डाङ्गरी**–स्त्री., वनस्पति० डङ्गरी ( ध. १.१८१ )
तांबडा भोपळा, काशीफळ, कोहळा, डांगर.

**डिण्डिमाणवक**–पु., प्रतुदपक्षि० डिण्डिमोत्कटध्वनिः ( सुसू. ४६.६७ )
भक्ष्य टोचून खाणारा एक पक्षी. दवंडी पिटण्याच्या वाद्याचा आवाज. डिम डिम.

**डिण्डिमानक**–पु., प्रतुदपक्षि० डिण्डिमवद्धुत्कटध्वनिः ( चसू. २७.५१ )
पहा ' डिण्डिमाणवक '.

**डिण्डीरमोदक**–न., वनस्पति० गृञ्जनम् ( ध. ४.३७ रा. ७.५५ ) गाजर.

**डुडुरक**–पु., शाक० पत्राणि शाकत्वेनोपयुज्यन्ते, तद्गुणाः– स्वादुः, सक्षारो, लवणानुरसः, स्वादुपाकः, शीतो, रूक्षः, सरो, वातलो, नातिपित्तलः, कफघ्नः ( सुसू. ४६.२७४–७५ )
डोडी. दोडी. हरिणदोडीच्या जातीची भाजी. हिची पाने भाजी करिता वापरतात. **गुण**–गोड, मागाहून खारट, क्षारयुक्त, पचनानंतर गोड, थंड, रूक्ष, सारक, कफघ्न, थोडे पित्त वाढविते, वातुळ.

**डुण्डुक**–पु., वनस्पति० टिण्टुकः (इन्दु) असंउ. २२) टेंटु.
**डोरली**–स्त्री., वनस्पति० बृहती ( रा. ४.१२१ ) डोरली

## ढ

**ढालन**–न., प्रक्षेपणम्, विद्रुतद्रव्ये निक्षेपणम् ( र. २.१६७.६८ )
पातळ केलेल्या धातूत अन्य द्रव्य घालणे.

**ढेकीयन्त्र**–न., स्थापितौषधियुक्तपारदस्य घटस्य गलादधःस्थच्छिद्रे वंशनालं प्रक्षिप्य तदेव तलस्थितजलगर्भे परस्परसंपुटितकांस्यपात्रद्वयमध्ये प्रवेशयेद्येन वह्नितापितघटादुत्थितः पारदो वंशनालद्वारा कांस्यपात्रस्थे जले पतति, ढेकीयन्त्रापरपर्यायम् ( र. ९.१७–१९ )

ढेकीयंत्र. एका घड्याच्या गळ्याला छिद्र पाडावे. काशाची दोन भांडी घेऊन त्यात पाणी घालून एकाच्या तोंडावर दुसरे पालथे ठेवून संधिलेप करावा. या दोन भांड्यांच्या सांध्यात वर किंवा खाली भोक पाडून बांबूच्या पोकळ नळीचे एक टोक बसवावे, दुसरे टोक भोक पाडलेल्या घड्याच्या भोकात बसवून संधिलेप करावा. पाऱ्याच्या भांड्याखाली अग्नि लावावा. म्हणजे पाऱ्याची वाफ होऊन काशाच्या भांड्यातील पाण्यात जमा होईल. यावेळी काशाच्या वरच्या भांड्यावर ओल्या घड्या ठेवाव्या.

**तक्कारी**–स्त्री., वनस्पति० अग्निमन्थः बृहत्पञ्चमूलेष्वेका ( असंउ. १ )

अरणी, पांढरी टाकळी.

**तक्र**–न., आहारद्रव्य० दुग्धविकृतिः, मथितं दधि तक्रमित्युच्यते । तद्द्विविधम्–सजलं निर्जलं च । पुनश्च सजलं द्विविधं सस्नेहं निःस्नेहं च । तत्र निर्जलं तक्रं ससरं घोलमित्युच्यते । असरोदकं तु मथितमित्युच्यते । दधिचतुर्थांशजलं सामान्यतस्तक्रमित्युच्यते । अर्धवारिकं मथितं दध्युदश्विदित्युच्यते । मथितं दधि सारहीनं छच्छिकानाम्ना प्रसिद्धम् । तक्रसामान्यगुणाः–कषायाम्लं, स्वादु, स्वादुपाकमुष्णं, लघु, पथ्यं, दीपनं, प्रीणनं, वृष्यं, संग्राहि, स्वादुविपाकित्वान्न च पित्तप्रकोपणं कषायोष्णविकाशित्वाद्रूक्षत्वाच्च कफे हितं वाते स्वाद्वम्लसान्द्रत्वाद्धितकरं, ग्रहणीदूषिणां तक्रं दीपनग्राहिलाघवाद्विशेषतः पथ्यम् ( चचि. १५.११८–११९ ) शोफोदरार्शोमूत्रग्रहारुचिप्लीहगुल्मघृतव्यापद्गरपाण्डुरोगादींश्च जयेत । ( चसू. २७.२२९ ) सद्यस्कं तक्रमविदाहि । ( अहसू. ५.३३–३४ ) ( अहचि. १०.४–५; भा.प्र. ) आमं तक्रं कोष्ठे कफं हन्ति कण्ठे तु कफं करोति, पीनसश्वासकासादौ सिद्धमेव तक्रमुपयोजयेत् । ( असंसू. ७ ) मन्दजातं तक्रं मरुत्कोपि रूक्षाभिष्यन्दि दुर्जरम्, तदेवातिजातं भृशाम्लौष्ण्यतैक्ष्ण्यात्परं पित्तकरम् ( अरु. अहसू. ५.३३ ) घोलं तु दधिगुणमेव ( ड. सुसू. ४५.८५ ) उदश्वित्कफकृद्बल्यमामघ्नं च, छच्छिका लघ्वी पित्तश्रमतृषाहरा । समुद्धृतघृतं तक्रं लघु विशेषतः पथ्यं च । स्तोकोद्धृतघृतमर्धोद्धृतसस्नेहं गुरु वृष्यं कफापहम् । अनुद्धृतघृतं तक्रं सान्द्रं गुरु पुष्टिप्रदं कफप्रदं च, ( भाप्र. ) शीतकाले अग्निमान्द्ये अरुचौ स्रोतसां रोधे वातामयेषु च तक्रममृतोपमं स्यात् ( भाप्र; ) तथैव कफोत्थेषु रोगेषु कोष्ठस्थवातस्य दुष्टयां प्रशस्यते ( सुसू. ४५.८७ ) तक्रनिषेधः–क्षते दुर्बले मूर्च्छाभ्रमदाहेषु रक्तपैत्तिके रोगे तथैवोष्णकाले तक्रं न दद्यात् ( सुसू. ४५.८६ )

**ताक**–दुधाचा विकार. आहारातले द्रव्य. घुसळलेले दही म्हणजे ताक. २ **प्रकार**–पाणी घातलेले व न घातलेले. पुन्हा २ **प्रकार.** लोणी असलेले व काढलेले (लोणी नसलेले) साई सुद्धा पाणी न घालता घुसळलेल्या दह्यास **घोल** ( घोळ ) म्हणतात. साय नसलेले पाणी घातलेले **मथित** होय. दह्यात चवथा हिस्सा पाणी सामान्यतः घालतात. त्याला **ताक** म्हणतात. अर्धे पाणी घातलेल्यास **उदश्वित्**; लोण्याखेरीज मथिताला **छच्छिका** म्हणतात. **सामान्य गुण**–गोड, आंबट, तुरट, पचल्यावर गोड. उष्ण, हलके, पथ्यकर, तृप्तिकर, अग्निदीपक, मळ बांधणारे, शुक्र धातूला हितकर, ताक पचनोत्तर गोड म्हणून पित्तप्रकोपक नाही. तुरट उष्ण संधिबंधने ढिली करणारे म्हणून कफनाशक. गोड आंबट फार पातळ नसलेले स्निग्ध ताक वातावर उपयुक्त. अग्निदीपक मल बांधणारे हलके म्हणून ग्रहणीवर पथ्यकर. सूज, उदर, मूळव्याध, मूत्र अडणे, रुचि नसणे, प्लीहावृद्धि, गुल्म, कृत्रिम विष, पांडु इ० रोग नाशक. **ताजे ताक** घशाशी जळजळ करीत नाही. तूप अधिक खाल्ल्याने होणारे तुपाचे विकार ताक नष्ट करते, **कच्चे ताक** पोटातला कफ नष्ट करते पण घशात कफ करते. म्हणून पडसे श्वास खोकला यांवर सिद्ध ताकच द्यावे. अदमुरे अर्धे **मुरलेले पुरे विरजले न गेलेले दही ताक** वातप्रकोपक रूक्ष स्राव वाढविणारे पचायला जड. तेच अतिशय मुरले तर आंबट तीक्ष्ण होते त्यामुळे अति पित्तकर.

**घोल** दह्याच्या गुणासारखे. **उदश्वित्** ( अर्धे पाणी घातलेले ) कफकर बलकर आमनाशक. रूक्ष ताक–**छच्छिका** हलकी, पित्त थकवा तहान नाशक. **लोणी काढलेले ताक** हलके व पथ्यकर, थोडे लोणी काढलेले ताक घट्ट जड पौष्टिक कफकारक. हिवाळ्यात अग्निमांद्यात रुचि नसताना स्रोतसात

अडथळा असतो तेव्हा वातरोगात ताक अमृता-सारखे; कफरोग, पोटात वातदुष्टि असताना चांगले. ताकाचा निषेध–व्रण, दुर्बल, मूर्च्छा, भ्रम, दाह, रक्तपित्ताच्या रोगात, तसेच उन्हाळ्यात ताक घेऊ नये.

हिं.—छाछ, मठ्ठा.
बं.—घोल.
**म.—ताक.**
गु.—छाश.

**–कूर्चिका**–स्त्री., तक्रविकृति० **विनष्टं घनावयवं तक्रम्**; गुणाः–**ग्राहिणी, वातला, रूक्षा, दुर्जरा च** ( सुसू. ४५.९० )
फुटलेले ताक, घन व द्रव अवयव ज्याचे पृथक् झाले आहेत असे ताक; रूक्ष मल बांधणारे वातूळ व पचण्यास कठीण.

**–जन्म**–न., दधि दुग्धविकृति० **तक्रस्य जन्म यस्मात्तत्** तक्रजन्म; दधि ( ध. ६.१८८ ) दही.

**–पिण्डक**–पु., तक्रजघनभागः ( चक्र. चचि. १४. ९ ) **तक्रकूर्चिकाया एव स्रुतद्रवो घनो भागो, विशदो, गुरु, रूक्षो, ग्राही च** ( चसू. २७. २३६ )
फुटलेल्या ताकाचा जाडसर मऊ कणभाग; फुट-लेल्या ताकातील पाणी वेगळे केल्यानंतर राहिलेला कणभाग.

**–भक्षा**–स्त्री., वनस्पति० **तक्राह्वा** ( रापरि. ४.२९ )
ताकासारखी पांढरी ताकावर वाढणारी पांच अंगुले लांबीची वनस्पती.

**तक्राभ्यास**–पु., उपक्रम० **तक्रस्य सततं सेवनम्** ( चसू. २५.४० )
उपचार. ताकाचे सतत सेवन. ताकावर राहणे.

**तक्राम्ल(यूष)**–पु., कृतान्न० **तक्रेण क्रियते योऽम्लयूषः सः, तद्गुणाः–पित्तकृत्, विषरक्तप्रदूषणश्च** ( सुसू. ४६.३७७ )
ताक घालून तयार केलेले आंबट डाळींचे कढण. **गुण**–पित्तकर विषाची चिन्हे वाढविणारे व रक्त दूषित करणारे.

**[त]ारिष्ट**–पु. न., आसुत० **यमान्यामलकहरीतकीमरि-चानां प्रत्येकं पलत्रयं गृहीत्वा पञ्चलवणानि च पलांशानि समादाय एकत्र चूर्णयेत् । तत्र तक्राढ-केन योजितं तक्रारिष्टं सम्पद्यते । इदं तक्रारिष्टं दीपनं ग्रहण्यां विशेषतो लाभकरं शोथगुल्मार्शः-क्रिमिमेहोदरापहश्च** ( चचि. १५.१२१–१२२ )
**ताकाचे अरिष्ट.** ओवा, आवळा, हिरडा, मिरी ही प्रत्येकी बारा तोळे व दोनशे सोळा तोळे ताक एकत्र ठेवून केलेले आसव. **गुण**–अग्निदीपक ग्रहणीला फायदेशीर सूज गुल्म मूळव्याध कृमि प्रमेहनाशक.

**तक्राह्वा**–स्त्री., वनस्पति० **कटुः कृमिघ्नी व्रणनिर्मूलयित्री** ( रापरि. ४.२९ )
पहा 'तक्रभक्षा'. तिखट, कृमिनाशक, व्रण निर्मूल करणारी.

**तक्षक**–पु., सर्प० **अस्य विषं घोरं प्राणहरं च** ( चचि. २३.१९४–१९५ )
अतिजहाल विषाचा साप. ताबडतोब प्राणहारक.

**तक्षण**–न., **कृशीकरणम्, तनूकरणम्** ( असंचि. १० )
कृश करणारे.

**तगर**–पु., वनस्पति० **मदनः** ( ध., १.६८ ) **शीत-प्रशमने एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१७; ) **तद्गुणाः–कषायः** ( ध. ) **तिक्तः** ( रा. ) **उष्णः** ( ध. ) **शीतः** ( रा. ) **स्निग्धस्त्रिदोषघ्नः, दृक्शीर्षविषदोषघ्नो भूतापस्मारनाशनः** ( ध. ) **भूतोन्मादघ्नः** ( रा. )
हिं.—तगर.
**म.—तगर.**
गु.—तगर.
बं.—टगर.
तगर, तगर गठोना. थंडावा कमी करणारे. **गुण**–कडु तुरट उष्ण स्निग्ध त्रिदोषघ्न दृष्टि डोळे विष यांचे दोषघ्न नाहीसे करणारा. भूतबाधा ( उन्माद ) अपस्मारनाशक.

**तडाग**–पु., जलाशय० ( चक्र. चसू. २७.२१४ ) ( सुसू. ४५.४ )
पाणी सांचवलेले क्षेत्र. तलाव.

**तडिद्गुण**–पु., **विद्युल्लता** ( सुउ. ७.१९–२० ) वीज.

**तण्डुल**–पु., आहारद्रव्य० **धान्यादिसारः** ( चसू. ५.९ )
तांदूळ. धान्य, वनस्पतीचे बी ( बारीक )
पु., **वनस्पति० तण्डुलीयकः** ( ध. ४.११६ )
तांदुळजा.
न., **वनस्पति० बिसम्** ( ध. ४.१६१ )
कमळाचे तंतू.
**व्रीहिः** ( र. २०.१९८–९९ )
**तद्गुणाः–नवस्तण्डुलः सुदुर्जरः स्वादुरसो बृंहणश्च; पुराणस्तण्डुलः सन्धानकृन्मेहहरश्च** ( सुसू. ४६.४१६–४१७ )

नवा तांदूळ गोड पचायला फार जड पौष्टिक. जुना तांदूळ जखम भरून आणणारा व प्रमेहनाशक.

**प्रमाण० अष्टौ रक्ताः सर्षपाः** ( चक. १२.८७ )
**' अष्टौ ते सर्षपा रक्तास्तण्डुलः '**

वजन. आठ मोहरीचे दाणे म्हणजे १ तंडुल.

**( तण्डुली )**–स्त्री., वनस्पति० शशाण्डुली ( रापरि. ७.१०३ )

धुरकट वाटोळया लवयुक्त पुष्कळ फळाची थोडी आंबट वनस्पती.

**यवतिक्ता** ( ध. १.२५६ ) ( रा. ३.३८१ )

बारिक फुलांची बळकट मुळांची अति कडु पसरणारी वनस्पती.

**विडङ्गम्** ( ध. २.११ ) वावडिंग.

**–कण्डन**–न., **तण्डुलगुण्डनम्** ( ड. सुसू. १३.२२ ) तांदुळाच्या कण्या.

**–नामन्**–पु., वनस्पति० **तण्डुलीयकः** ( रा. ५.१७५ ) तांदुळजा.

**तण्डुलाम्बु**–न., **तण्डुलधावनाम्बु** ( चक्र. ) **अन्ये तु तण्डुलाद् द्विगुणमम्लं तण्डुलेन समं चिरं स्थितं तत्तण्डुलाम्बु वदन्ति** " ( चक्र. ) ( चचि. १५. १२९–३० ) **प्रक्षालितं तण्डुलोदकम्** ( सुचि. ३४.११ )

तांदुळाचे धुवण. तांदुळात आठपट पाणी घालून ते चोळून काढलेले पाणी. प्रथम पाणी घालून काढून टाकावे दुसऱ्यांदा पाणी घालून चोळावे. **दुसरे मत**– तांदुळाच्या दुप्पट आंबट द्रव्य घालून अनेक दिवस ठेवून काढलेले पाणी.

**तण्डुलिन्**-पु., वनस्पति० **तण्डुलीयकः** ( रा. ५.१७४ ध. ४.११६ ) तांदुळजा भाजी.

**तण्डुलीय**–पु., वनस्पति० **तण्डुलीयकः पत्रशाकम्** ( ध. ४.११६ रा. ५.१७४ ) तांदुळजा भाजी.

**मेघनादः** ( र. ४.६४–६५ ) **गुणाः–लघुर्मधुरः, शीतो, रूक्षो, दीपनो, रुच्यो, मधुरः, पथ्यः, पित्तकफास्रजिद्विषरक्तपित्तदाहघ्नः**

हिं.––चौलाई.

**म.––तांदुळजा.**

गु.––तांदळजानी भाजी.

बं.––कांटा नटिया.

त.––मुळुक्किरइ.

फा.––सफेदमर्ज.

**तांदुळजा. गुण**–गोड, थंड, रुक्ष, हलका, रुचकर, अग्निदीपक, पथ्यकर, पित्त, कफ, रक्तदोष, विष, रक्तस्राव, दाहनाशक.

**–दल**–न., वनस्पति० **गुणाः–हिमं, ग्राहकं, रुचिदायि अर्शःपित्तरक्तविषकासविनाशि, दाहशोषशमनं, मधुरविपाकम्** ( रा. परि. ७.८३ )

एक वनस्पती. **गुण**–पचल्यावर गोड, रुचकर, थंड, दाह, शोष, पित्त, रक्तदोष, विष, खोकला, मूळव्याध-नाशक.

**तण्डुलीयक**–पु., वनस्पति० **तण्डुलीयः** ( चसू. २७.९५ ) ( सुसू. ४६.२५६ ) तांदुळजा.

**( तण्डुलीयका )**–स्त्री., वनस्पति० **विडङ्गम्** ( रा. ६.१५ ) वावडिंग.

**–मूल**–न., **मूषकविषे एतत्सिद्धघृतं पाने हितम्** ( असंउ. ४६ )

तांदुळजाचे मूळ, पाने, सिद्ध तूप उंदराच्या विषावर हितकर.

**तण्डुलीयकादिवर्ग**–पु., **तण्डुलीयकोपोदिकाऽश्वबलाचिल्लीपालङ्क्यावास्तूकप्रभृतीनि; तेषां सामान्यगुणाः– सृष्टमूत्रपुरीषाणि सक्षारमधुराणि च, मन्दवातकफान्याहुः रक्तपित्तहराणि च** ( सुसू. ४६.२५६–५७ ) तांदुळजा इ. चा वर्ग. तांदुळजा, थोर मयाळ, मोठी मेथी, चिल्ली, पालक, चाकवत, इत्यादी. **गुण**–सक्षार गोड मळमूत्र साफ करणारा. कफवात थोडे वाढवणारा, दोषांनी होणारा रक्तस्राव थांबविणारा.

**तण्डुलोदक**–न., **तण्डुलधावनोदकम्** ( चचि. १९.५१ ) **तण्डुलाद्द्विगुणमम्लं तण्डुलेन समं चिरं स्थितं तत्तण्डुलाम्बु वदन्ति** ( चचि. १५.१३० )

**गुणाः–संग्राहि, तण्डुलाम्बु स्यात्कषायं मधुरं लघु विषदाहतृषाच्छर्दिपित्ततापविनाशनम्** ( भाप्र. )
**" जलमष्टगुणं दत्त्वा पलं कण्डिततण्डुलात् ।
भावयित्वा ततो देयं तण्डुलोदककर्मणि ॥ "**

तांदुळाचे धुवण. पहा ' तण्डुलाम्बु. ' **गुण**–गोड, तुरट, हलके, मल बांधणारे, पित्ताचा त्रास कमी करणारे, कष्टाने लघ्वी होणे दाह तहान व विषनाशक.

**तण्डुलोद्भव**–न., वनस्पति० **पलाशगन्धा** ( ध. २.५८ ) ( रा. ६.८८ ) वंशलोचनाचा प्रकार.

**( तण्डुली )–बीज**–पु., वनस्पति० **तण्डुलीयकः** ( ध. ४.११६ ) तांदुळजा भाजी.

**तत्कर**–पु., वनस्पति० **रक्तैरण्डः, गुणाः–लघुः श्वयथुपचनः, शान्तिरक्तार्तिपाण्डुभ्रान्तिश्वासज्वरकफहरोऽरोचकघ्नः** ( रा. १.४.४७ )

तांबडा एरंड. **गुण**–हलका, कफ, अरुचिनाशक, सूज पचविणारा, शांती रक्तदोष, पांडु, श्वास, ज्वर, भ्रमनाशक.

**तत्त्व**–न., यथार्थं, तात्त्विकम्, वास्तविकम् (चशा. १.५५)

**निर्णयः** (चवि. ८.३३)

जसे असेल तसे, तात्विक, वास्तविक. निर्णय.

**–चतुर्विंशति**–स्त्री., **सांख्यदर्शनोक्तो व्यक्ताऽव्यक्तप्रकृतेः प्रपञ्चः अव्यक्तमहदहङ्कारा एकादशेन्द्रियाणि पञ्चतन्मात्राणि पञ्चभूतानीति चतुर्विंशतिः। एषा शरीराधिष्ठानभूतानां जडतत्त्वानां चतुर्विंशतिः** (सुशा. १.४)

**चरकमतानुसारेण तु उदासीनं पुरुषमव्यक्ताख्यामेव प्रकृतौ प्रक्षिप्य अव्यक्तशब्देनैव गृहीतः** (चक्र. चशा. १.१७)

चोवीस तत्त्वे. सांख्य दर्शनात व्यक्त व अव्यक्त प्रकृतीचा विस्तार २४ तत्त्वांचा. अव्यक्त महत् अहंकार हे तीन, ११ इंद्रिये पाच तन्मात्रा पाच भूते मिळून. ही शरिराचे अधिष्ठान असलेली २४ व पंचविसावा पुरुष. चरकाच्या मताने उदासीन पुरुष प्रकृतीत समाविष्ट करून त्याला अव्यक्त म्हणून एकंदर चोवीस धातु तत्त्वे आहेत.

**तत्त्वतः**–अव्य० **परमार्थतः** (ड. सुचि. ३४.२२)

खऱ्या अर्थाने, सत्याला धरून.

**तत्त्वाधिगतशास्त्रार्थ**–वि., **यथावदधीतशास्त्रो यथावज्ज्ञाततदर्थश्च, वैद्यगुणेष्वेकः** (सुसू. ३४.१९–२०)

शास्त्राच्या मुळाशी असलेल्या तत्त्वांचे ज्ञान असलेला. शास्त्र व तत्त्वे यांचे वास्तव ज्ञान असलेला. हा वैद्याच्या गुणांपैकी एक.

**तदर्थकारिन्**–वि., **विपरीतार्थकारी, व्याधिप्रशमस्वरूपं कार्यं करोति इति** (चवि. २.१३)

रोग. कारण व रोग यांच्याशी समान असून रोगाच्या विपरीत म्हणजे रोगनाशक कार्य करणारे.

**तदात्वसुखसंज्ञक**–वि., तत्कालसुखफलः (**योषिदाहारादिः**) (असंसू. ९.८५)

तत्काळ-तावडतोब सुख देणारे. तरुणस्त्री.; स्वादिष्ट आहार, इत्यादी.

**तद्द्रव्य**–न., **आहारद्रव्य० दधि.** (रा. १५.२४५; ध. ६.१८८) दही.

**तद्विद्य**–वि., **तज्ज्ञः** (सुसू. ४.६) तज्ञ, जाणता.

**–वृत्त**–वि., **तद्विद्यः; अत्र वैद्यः वैद्यस्य वृत्तिः चरितार्थसाधनं व्यवसायो वा यस्य स तद्विद्यवृत्तः शिष्यः** (चवि. ८.८)

येथे तद्विद्य म्हणजे वैद्य हाच. वैद्याची वृत्ति (चरितार्थ साधन–व्यवसाय) ज्यांचा तो. तद्विद्यवृत्त म्हणजे शिष्य.

**–संभाषा**–स्त्री., **तच्छास्त्राध्यायिना सह संभाषणम्** (चवि. ८.६)

त्या शास्त्राचे अध्ययन करणाराशी संभाषण. तज्ज्ञाशी शास्त्रचर्चा.

**तनिक**–न., **शाक०** (असंसू. ७.१२४–२६) एक भाजी.

**तनु**–वि., **स्वच्छम्** (चक्र. चचि. २२.२६) स्वच्छ.

**कृशम्** (चचि. ५.४) कृश.

**सूक्ष्मम्** (सुउ. ६०.११) सूक्ष्म.

**अच्छम्** (ड. सुसू. १४.२१) चिकटपणा नसलेले.

**विरलम्** (सुउ. ४.४) विरळ.

**द्रवम्** (चचि. १८.८५) पातळ.

**अघनम्** (सुचि. १०.११) घट्ट नसलेले.

स्त्री., **शरीरम्** (सुचि. २७.३) शरीर.

**(तन्वी)**–स्त्री., **वनस्पति० शालिपर्णी** (रा. ४.११४) सालवण.

**पृश्निपर्णी**–(ध. १.९१) पिठवण.

**हिङ्गुपत्री**–(ध. २.३८) बाफळी.

**–क्षीर**–पु., **वनस्पति० आम्रातकः** (ध. ५.१२)

एक आंबट फळ. (चकोत्रा)

**–च्छाय**–पु., **वनस्पति० जालबर्बुरः। गुणाः–कषायः उष्णो, रूक्षः, कफहृद्दाहकारको वातामयविनाशकृत्** (रापरि. ८.१४)

बारीक दिसणारी अगदी बारीक शाखा असलेली पण जाड काट्यांची वनस्पती. **गुण**–तुरट, उष्ण, रुक्ष, कफहर, हृदयास दाहकर, वातरोगनाशक.

**–त्र**–न., **कवचम्** (ड.) **तनुं त्रायते रिपुकृतप्रहारादिति तनुत्रम्** (सुक. १.५५) कवच. चिलखत.

**–त्व**–न., **लक्षण० अस्थूलत्वम्** (चसू. १३.४५)

किडकिडीतपणा. कृशता.

**–त्वचा**–स्त्री., **वनस्पति० अग्निमन्थः** (ध. १.११०; रा. ९.१३८) अरणी. पांढरी टाकळी.

**–नेत्र**–न., **परिव० बस्तिनेत्रदोषः, अनेन क्षोभो भवति** (चसि. ५.४–५)

गुदात घालावयाच्या बस्तीच्या नळीचा दोष. ती बारीक असणे. या दोषाने आत क्षोभ होतो.

**–बीज**–पु., वनस्पति० बदरः (रा. ११.१६०; ध. ५.९६) बोर.

**–मार्दव**–न., शरीरमृदुत्वम् (अहृसू. ११.३) शरीर मऊ असणे. शरीराचा मऊपणा.

**–राग**–वि., लक्षण० ईषल्लोहितमल्परागं वा (नयनम्) (सुउ. १९.६–७) लालसर. थोडा लाल (डोळा)

**–रुह्**–न., रोम, लोम, केशः (अहृसू. २९.८) केस, लव.

**–वस्त्र**–न., सूक्ष्मवस्त्रम् (ड.) सुचि. ३२.१२) पातळ झिरझिरीत कापड. मलमल.

**तन्तु**–पु., सूत्रम् (अहृसू. ७.६) तंतु, धागा, सूत.

**तन्तुक**–पु.. मण्डलीति सर्प० (सुक. ४.३४–२) एक सर्प.

**तन्त्र**–न., शास्त्रम् (अहृसू. १.४); तन्त्रमितरेतराभिसम्बद्धस्य अर्थसमूहस्योपदेशः शास्त्रम् (चवि. ८.३७) शास्त्र. परस्पर संबद्ध अर्थ समुदायाचा उपदेश.

आयुर्वेदः (चसू. ३०.३१) आयुर्वेद.

चिकित्साङ्गभूतं कर्म, उपक्रमः (चसू. २४.४०) उपचाराचे अंगभूत कर्म. चिकित्सेकरिता करावयाचे कर्म., उपक्रम.

त्रायते शरीरमनेन इति तन्त्रम्, शास्त्रचिकित्सा च (ड. सुउ. ६५.१)

ज्याच्याने शरीर तारले जाते ते तंत्र; शास्त्र. चिकित्सा.

शरीरम् (चसू. १२.८) शरीर.

**(तन्त्री)**–स्त्री., वनस्पति० गुडूची (कासं जातिसूत्रीय) गुळवेल.

**–कर्तृ**–वि., शास्त्रकारः (चसू. २६.३७) शास्त्रकार.

**–प्रयोग**–पु., तन्त्रं शरीरं, तस्य परिपालनार्थं सद्वृत्तोक्तः प्रयोगः (चनि. ७.४) तंत्र म्हणजे शरीर, त्याच्या परिपालनाकरितां सद्वृत्तात सांगितलेला प्रयोग.

**–भूषण**–वि., शास्त्रालङ्कारभूतः (सुसू. ३.४२) शास्त्राला अलंकारभूत.

**–यन्त्र**–न., शरीरस्य यन्त्रं सिरास्नाय्वादिरूपं, तच्च तन्त्रयन्त्रम् (चइ. १२.४४) शरिराचे यंत्र. सिरास्नायु इत्यादी रूप ते तंत्रयंत्र.

**–युक्ति**–स्त्री., तन्त्रस्याधीतशास्त्रस्य युक्तिर्योजना। योजना द्विविधा–वाक्ययोजना योगोद्देशनिर्देशाद्या, अर्थयोजना अधिकरणपदार्थोदयः (ड सुउ. ६५.१) अर्थयुक्तिः (सुउ. ४१.६–७) नामानि–अधिकरणादीनि द्वात्रिंशत् तन्त्रयुक्तिनामानि कीर्तितानि–अधिकरणम्; योगः; पदार्थः; हेत्वर्थः; उद्देशः; निर्देशः; उपदेशः; अपदेशः; प्रदेशः; अतिदेशः; अपवर्जः; वाक्यशेषः; अर्थापत्तिः विपर्ययः; प्रसङ्गः; एकान्तः; अनेकान्तः; पूर्वपक्षः; निर्णयः; अनुमतम्; विधानम्; अनागतावेक्षणम्; अतिक्रान्तावेक्षणम्: संशयः; व्याख्यानम्; स्वसंज्ञा; निर्वचनम्; निदर्शनम्; नियोगः; विकल्पः; समुच्चयः; ऊह्यम् (सुउ. ६५.३)

तंत्राची आत्मसात केलेल्या शास्त्राची युक्ति म्हणजेच योजना. प्रकार २ वाक्ययोजना, अर्थयोजना. असंबद्ध वाक्य असल्यास ते सुसंबद्ध करणे ही वाक्ययोजना; अर्थाची संगति लागत नसेल तर संगति लावणे व अर्थ गूढ असेल तर तो सुस्पष्ट करणे ही अर्थयोजना होय. योजना ३२ आहेत. नावे वर आहेत.

**–युक्तिप्रयोजन**–न., वाक्ययोजनम्, अर्थयोजनं च द्विविधं तन्त्रयुक्तीनां प्रयोजनम्, असद्वादिप्रयुक्तवाक्यानां प्रतिषेधः, स्ववाक्यसिद्धिः, अव्यक्तलीनाऽनिर्मललेशोक्तानामर्थानां प्रसादनं तन्त्रयुक्तितो भवति (सुउ. ६५.४–५–६)

तंत्रयुक्तीचे प्रयोजन (जरुरी). १ वाक्य योजना २ अर्थयोजना (१) प्रतिपक्षीय किंवा एकांगी विधान खोडून काढणे व आपले विधान सिद्ध करणे तसेच (२) अस्पष्ट गूढ अशुद्ध अल्पांशाने अर्थ दर्शविणारे विधानांचे निर्दोष अर्थ तंत्रयुक्तीने व्यक्त करतां येतात.

**–युक्त्यध्याय**–पु., परिव० अध्यायसंज्ञाविशेषः (सुउ. ६५.१) अध्यायाचे नांव.

**तन्त्रक**–वि., प्रेरकं धारकं च (चवि. ८.११९) प्रेरक व धारक.

**(तन्त्रिका–)**–स्त्री., वनस्पति० गुडूची (ध. १.३) गुळवेल.

**–कर्णरोग**–‘कृशा दृढा च तन्त्रीवत् पाली वातेन तन्त्रिका’ (असंउ. २१)
कानाच्या पाळीचा रोग. यांत वाताने कानाची पाळी दोरी–तारे सारखी पातळ दडस होते.

**तन्त्रानुशीलन**–न., सततं शास्त्राभ्यासः (असंसू. २२.२२)
तंत्राचे शास्त्राचे अनुशीलन, सतत अभ्यास.

**तन्त्वाकृति**–वि., ( क्रिमिः ) तन्तुरिव दीर्घसूत्राकृतिः ( चवि. ७.१२ ) सुते. सुतासारखा बारीक कृमी.

**तन्दुल**–पु., शाक० तण्डुलीयः ( र. १२.१०१–१०३ ) तांदुळजा. चवळाई.

**तन्दुलाम्बु**–न., तण्डुलधावनोदकम् ( असंशा. ४.५ ) तांदुळाचे धुवण.

**तन्दुलीयक**–पु., वनस्पति० तण्डुलीयकः ( र. २६.१२ ) तांदुळजा. चवळाई.

**तन्द्रा**–स्त्री.,–रोग० रसप्रदोषजविकारः ( चसू. २८.९ ) विंशतिश्लेष्मविकारेष्वेकः ( चसू. २०.१७ ) वैकारिकी तमोवातकफात् तन्द्रा भवति ( सुशा. ४.५६ ) संप्राप्तिः–वायुनोदीरितः कफो हृदयं समवस्कन्द्य हृदयाश्रयान् ज्ञानादीन् समावृणोति तदा तन्द्रोपजायते। तल्लक्षणम्–हृदये व्याकुलीभावो, वाक्चेष्टेन्द्रियेषु गौरवं मनोबुद्ध्यप्रसादश्चेति ( चसि. ९.२१–२४ ) इन्द्रियार्थैष्वसंप्राप्तिः अग्रहणं गौरवं जृम्भणं क्लमः ( सुशा. ४.४९ )

लक्षण० ( सु. उ. ३९.३५ ) झापड.

निद्रातन्द्रयोर्भेदः निद्रायाः प्रबोधितस्य क्लमाभावः, तन्द्रायां तु प्रबोधितोऽपि क्लाम्यति

रसदुष्टीचा विकार. वीस कफरोगांपैकी एक. वातकफ व मनाचा तम यांनी हा होतो. **संप्राप्ति**–वायूने कफ हृदयात आणून हृदयाश्रयी ज्ञान इत्यादींना झाकतो तेव्हा तंद्रा होते. **लक्षण**–हृदय व्याकूळ होते, बेचैनी, बोलणे हालचाल इंद्रिये यात जडपणा, मन, बुद्धि ही अप्रसन्न होतात, इंद्रियांच्या विषयांचे ज्ञान होत नाही. जडपणा जांभई व थकवा. **निद्रा व तंद्रा यात फरक** झोपेतून उठल्यावर थकवा नसतो व तंद्रेतून जागे झाल्यावर थकवा असतो.

निद्राभेदः ( ड. सुसू. ४५.३ )

· झोपेचा प्रकार, अधर झोप, कुत्र्यामांजराची झोप. अगदी सावध झोप.

आलस्यम् ( सुसू. ३.५५ ) आळस.

**–कृत्**–स्त्री., वनस्पति० विजया भङ्गा ( ध. १.१३० ) भांग.

**तन्द्रालु**–वि., तन्द्रायुक्तम्, श्लेष्मतमोऽनिलभूयिष्ठम् ( चशा. ८.२१ )

तंद्रायुक्त. तंद्रीत असणारा ( चिंतनात नव्हे ) कफवात व मनाचा तमोदोष हे अधिक असतात.

**तन्द्रि**–स्त्री., लक्षण० तन्द्रा ( सुउ. ४४.११ ) झापड.

**तन्द्रिक**–पु., रोग० सन्निपातज्वरभेदः ( मा. १४ ) लक्षणानि–प्रभूता तन्द्रार्तिज्वरकफपिपासाकुलतरो भवेच्छ्यामा जिह्वा पृथुलकठिना कण्टकवृता । अतीसारश्वासक्लमथुपरितापश्रुतिरुजो भृशं कण्ठे जाड्यं शयनमनिशं तन्द्रिकगदे । अस्य मर्यादा पञ्चविंशतिः वासराः। साध्योऽयं ज्वरः ( मा. १४ )

त्रिदोष ज्वराचा प्रकार. **लक्षणे**–या ज्वरात सारखी तंद्रा हे मुख्य लक्षण. कफ व त्याच्या वेदना अधिक; जीभ काळी जाड, कठिण, काट्यांनी भरलेली, अतिसार, श्वास, सर्वत्र मंद आग, कानात वेदना, घशात अतिशय जडपणा, सारखा झोपलेला दिसतो. याची मुदत २५ दिवस. साध्य.

**तन्द्री**–स्त्री., रोग० तन्द्रा ( चसू. १३.५९ ) तन्द्रारोग.

**तन्मयत्व**–न., तदात्मकत्वम् ( सुशा. १.१० ) तद्रूप होणे, तादात्म्य, तन्मय होणे.

**तन्मात्र**–न., अनुद्भूतस्वरूपं शब्दादि एव तन्मात्रसंज्ञम्, तामसाहंकारात् शब्दतन्मात्रादिपंचकं जायते । शब्दतन्मात्रं, स्पर्शतन्मात्रं, रूपतन्मात्रं, रसतन्मात्रं, गंधतन्मात्रं चेति पंचतन्मात्राणि । शब्दतन्मात्रादि पंचभ्य आकाशादीनि महाभूतानि संजातानि । ( सुशा. १०.४ )

शब्दस्पर्शादींचे अव्यक्त अतिसूक्ष्म स्वरूप तेच तन्मात्रा.

तामस अहंकारामुळे या तन्मात्रा होतात. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध अशा पाच तन्मात्रा होत. शब्दतन्मात्रा इत्यादींपासून क्रमाने आकाशादी महाभूते झाली.

**तपन**–पु., वनस्पति० अग्निमन्थः ( रा. ९.१३८ ) अरणी. पांढरी टाकळी.

शुक्लार्कः ( रा. १०.२९ ) पांढरी रुई.

भल्लातकः ( ध. ३.१४३ ) भिलावा, बिब्वा.

**–तनुनष्टा**–स्त्री., वनस्पति० शमी ( रा. ८.२५२ ) शमी.

**तपनीय**–न., लोहितसुवर्णम् ( चसू. २४.२२ ) सोने, धान्य० शालिप्रकाराणामन्यतमः ( चसू. २७.९ ) तांदुळाच्या प्रकारांपैकी एक.

खनिज० सुवर्णम् ( ध. ६.२ ) सोने.

**तपनीयक**–न., खनिज० सुवर्णम् ( ध. ६.२. रा. १३.१ ) सोने.

**तपनेष्ट**–न., खनिज० ताम्रम् ( रा. १३.११ ) तांबे.

**तपस्**-पु., कालविभाग० ( असंउ. ४९ ) माघमासः ( चचि. १ (२)११ ) माघ महिना.
तपति संतापयति शरीरादि कृच्छ्रव्रतादिना इति तपः ( ड. सुउ.६०.२० )
उपवासादि कठीण व्रतांनी शरीर तप्त करणे.

**(तपः)-पर**-पु., तपस्वी, यश्च विशिष्टतपःप्रभावेण मरणं निवारयति ( सुसू. २८.५ )
तपस्वी. विशिष्ट तपाच्या प्रभावाने मरण टाळतात.

**(तपो)-धना**-स्त्री., वनस्पति० श्रावणी, मुण्डिका ( ध. १.१५९ ) मुण्डी.

**-विघ्नाशन**-वि., तपोविघ्नोपजीवी ( असुरः ) ( चचि. ३.१६ )
तपामध्ये विघ्न आणण्याचा नित्य उद्योग असणारे राक्षस असुर इत्यादी भूतगण.

**(तपश्)-चक्षुस्**-वि., तपसा प्राप्तं चक्षुर्यस्य सः ( सुशा. ५.५० ) अत्र डल्हणटीकानुसारेण तपश्चक्षुरिति कर्मधारयत्वेन विगृहीतः, तेन तपांसि एव चक्षूंषि इत्येव प्राप्नोति इत्यनुसन्धेयम्
तपाने ज्याला डोळे आले तो. तप हेच डोळे.

**तपस्य**-पु., कालविभाग० फाल्गुनमासः ( चचि. १ ( २ ) ११ ) फाल्गुन महिना.

**तपस्विन्**-पु., वनस्पति० करञ्जः ( ध. ५.१०७ रा. ९.१७८ ) करंज.
दमनः ( ध. ३.६४ ) दवणा.

**(तपस्वि)-पत्र**-पु., वनस्पति० दमनः ( ध. ३.६४ रा. १०.१२० ) दवणा.

**(तपस्विनी)**-स्त्री., वनस्पति० जटामांसी ( ध. ३.४५ ) जटामांसी.

**तप्त**-वि., संतप्तम् ( सुसू. ४५.१२ ) तापलेला ( अग्नीत )

**-खल्व**-पु.,यन्त्र० नवाङ्गुलो दीर्घः निम्नत्वे च षडङ्गुलः। मर्दकोऽष्टाङ्गुलश्च लोहमयः खल्वः । खल्वाकृतिं चुल्लीं कृत्वा अङ्गारैश्च परिपूर्य तस्यां तं खल्वं निवेश्य पार्श्वे भस्त्रिकया धमेत् । औषधं च मर्दयेत् । अयं तप्तखल्वः ( र. ९.८८.९० )
नऊ अंगुळे लांब सहा अंगुळे खोल व आठ अंगुळे बत्ता असलेला लोखंडी खल. खलाच्या आकाराची चूल निखाऱ्यांनी भरून तो खल तिच्यावर ठेवून बाजूने भात्याने फुंकावे व औषधांचे मर्दन करावे. हा तप्तखल होय.

**-रूपक**-न., खनिज० रौप्यम् ( ध. ६.५ ) रुपे.

**-लोमश**-न., खनिज० कासीसम् ( ध. ३.१२३ ) हिराकस.



**तप्ताम्बुप्रविलायित**-वि., उष्णाम्बुकुम्भीबाष्पेण द्रवीकृतम् ( हे. अहसू. २४.५ )
ऊन पाण्याच्या वाफेवर पातळ केलेले.

**तप्तायःपिण्ड**-पु., तप्तलोहपिण्डः, जलव्यापत्तौ जले निर्वापणार्थं तप्तायोलोहपिण्ड उपदिष्टः ( सुसू. ४५.१२ )
तापलेला लोखंडाचा गोळा. जेव्हा पाणी विघडते तेव्हा तो पाण्यात विझवावा.

**तमक**-पु., रोग० श्वासभेदः ( चसू. १७.१०१ )
श्वासरोगाचा प्रकार.
न., वनस्पति० तामलकी, भूधात्री ( ध. ३.८४ ) भुई आवळी.

**-श्वास**-पु., रोग० संप्राप्तिः स्वरूपं च-यदा वायुः प्रतिलोमं स्रोतांसि प्रतिपद्यते तदा स वायुः श्लेष्माणं समुदीर्य ग्रीवां शिरश्च संगृह्य पीनसं करोति, पश्चात् श्लेष्मणावृतः कण्ठे घुरघुरशब्दं करोति, प्राणाधिष्ठानहृदयप्रपीडकं श्वासं च करोति, तेन श्वासवेगेन तमसि प्रविशतीवेति निश्चेष्टो भवतीति । अमुच्यमानेन कफेनातीव दुःखितो भवति; तस्यैव श्लेष्मणो विमोक्षान्ते मुहूर्तं सुखं प्राप्नोतीति वातकफारब्धत्वादुष्णमभिनन्दति । शयानस्यास्य पार्श्वे वायुनाऽवगृह्यते परमस्याऽऽसीनस्य सुखप्रत्ययो जायते । असौ तमकश्वासी उच्छ्रिताक्षः स्विद्यता ललाटेनोपलक्षितः । भृशमर्तिमान् विशुष्कास्यो मुहुःश्वासो दृश्यते । मुहुर्गजारूढस्येवाखिलगात्रं चाल्यते; मेघाम्बुशीतप्राग्वातैः श्लेष्मलैश्च श्वासो विवर्धते । इत्येवं स्वरूपस्तमकश्वासः प्रायो याप्य एव । नवोत्थितश्चेत् क्वचित् साध्यो भवति । स एव ज्वरमूर्च्छापरीतः प्रतमक इति संज्ञां लभते ( चचि. १७.५५-६२ )
दमा. एक प्रकार. **संप्राप्ति**-वात प्रकुपित होऊन नाक घसा फुफ्फुस यातील स्रोतसात कफाला उचंबळवून मान डोके यात विकृति करून नाकात पडसे आणि घशात घुरघुर करतो; व या फुफ्फुसातील कफाने अडवलेला वायु अतिशय तीव्र वेगाने जीव कासावीस होण्याइतका श्वास उत्पन्न करतो. त्याच्या अतीव तीव्र वेगाने अंधारात शिरल्यासारखे होऊन रोगी निश्चेष्ट होतो, खोकला येतो, छाती व डोके यातली स्रोतसे भरतात; चक्कर येते व खोकल्याने पुन्हा हीच स्रोतसे गच्च झाली की कांही सुचत नाही; कफ सुटत नाही म्हणून त्रास होतो व तो थोडा

सुटला की थोडा वेळ बरे वाटते. वातकफाने रोगाची सुरुवात होत असल्याने उष्ण प्रिय वाटते, ढास असते. बोलण्याला फार त्रास होतो, ह्या श्वास रोग्याचे डोळे वर उचलून येतात, कपाळावर घाम, तोंड सुकते, झोपला असतांना फासळ्याकडचा फुफ्फुसाचा भाग वाताने अवघडतो ( संकुचित करतो ) म्हणून फार त्रास होतो पण उठून बसला तर बरे वाटते. हत्तीवर बसून चालत असल्याप्रमाणे अवयवांना हेलकावे बसतात. हा श्वास ढग आले तर किंवा थंड पाणी हवा इ० चा उपयोग केला, पूर्वेकडचा वारा सुरू झाला, कफवर्धक पदार्थांचे सेवन केले की वाढतो. **साध्यासाध्य**—नवा क्वचित साध्य, पण जुना औषध पथ्य असेपर्यंत ठीक. तोच ज्वर व मूर्च्छायुक्त झाला की त्याला प्रतमक श्वास म्हणतात.

**तमस्**—न., प्रकृतेस्त्रिगुणेष्वेकगुणः । **अयं विषादात्मको नियमनकरो गुरुर्वरणकः** ( सुशा. १.३ )
तम. प्रकृतीच्या तिन्ही गुणांपैकी एक. विषादात्मक, नियमन करणारा, गुरु आणि आवरण करणारा गुण.
**मरणम्**, ( चइ. १२.४४ )
**'तमोऽन्त्यम्' इत्यस्यैव मरणरूपं तमः इत्यर्थ इति** (चक्र;) मरण. अंत.
**अन्धकारः** ( चचि. १७.६४ ) अंधार. काळोख.
**मानसदोष०** ( चसू. १.५७ ) मनाचा दोष.
**अशीतिवातविकारेष्वेकः** ( चसू. २०.११ ) **रसप्रदोषजरोगेष्वेकः** ( चसू. २८.९ ); **मूर्च्छा** ( चसू. २४.३९ )
ऐशी वातविकारांपैकी, रसदुष्टिजन्य एक. मूर्च्छा
**नेत्ररोग०** ( चचि. १७.१२८ )
चक्कर. अंधेरी. एक नेत्ररोग.
**ज्वरो मोहकर्तृत्वात् तम इत्युच्यते** ( चचि.३.१३ )
ज्वर. ज्वर मोह करितो म्हणून त्याला तम म्हणतात.
**तमोगुणो मोहादिस्वरूपस्त्रिगुणेष्वेकः** ( चसू. ८.५ ) तमोगुण. मोहादी त्रिगुणांपैकी. एक

**(तमः)—प्रवेश**—पु., लक्षण० **ज्ञानाभावः, निःसंज्ञता** ( चचि. १०.३ )
ज्ञानाचा अभाव. निःसंज्ञता, संज्ञा नाहीशी होणे.
**रोग० चत्वारिंशत्पित्तविकारेष्वेकः**( चसू. २०.१४)
चाळीस पित्तविकारांपैकी एक.
**कुपितरक्तस्य विकारः** ( कासू. २७.६२–६५ )
रक्तदुष्टीचा विकार.

**—प्रवेशन**—न., लक्षण० **अन्धकारदर्शनम्** ( ड. सुउ. ३९.८८ ) अंधेरी येणे.

**(तमो)—गृह**—न., शून्यगृहम् ( चचि. ९.३० )
मोकळे घर. काहीही वस्तु नसलेले ओसाड घर.

**—दर्शन**—न., लक्षण० **अन्धकारदर्शनम्** ( सुसू. २४.९ ) अंधार दिसणे.

**—भवा**—स्त्री.,**तमोगुणोद्रेकेण समागता निद्रा** (असंसू. ९.६८) तमोगुण वाढल्याने आलेली झोप.

**—भूत**-वि., **तमःसदृशं 'तमोभूते' इति अत्र भूतशब्द उपजायते** ( ड. सुउ. ७.१६ )
तमासारखे. तमाप्रमाणे झालेले.

**—वृद्धि**—स्त्री., लक्षण० **पुनः पुनस्तमोदर्शनम्** ( ड. सुक. ८.१२४ )
पुनःपुनः अंधेरी येणे, अंधेर दिसणे.

**तमाल**—पु., वनस्पति० **तापिच्छः तापिञ्जो वेत्यप्यस्य नामास्ति** ( रापरि. ९.१५ )
**फलमस्य साम्लमधुरम्, तद्गुणाः—मधुरं शिशिरं गुरु बल्यं वृष्यं तृषादाहश्रमभ्रान्तिहरं कफपित्तहरं च** ( रापरि. ९.१६ )
हिं.—तमाल.
म.—**झारम्बी.**
बं.—तमाल.
ता.—चितकामाराकु.
निळा ताड, झारंबी. त्याचे फळ आंबट गोड. **गुण**—गोड, थंड, जड, शुक्रधातूला हितकर, बलकर, तृष्णा, दाह, भ्रम, श्रम व कफपित्तहर.
**वरुणः** ( ध. ५.११९ ) वायवर्णा.
**भूधात्री** ( ध. ३.८४ ) भुईआवळी.
**तमालपत्रम्** ( रा. ६.८० ) तमालपत्र.

**—पत्र**—न., वनस्पति० **तद्गुणाः—लघु, तिक्तोष्णं, कफवातविषापहमर्शोहृल्लासारोचकापहं मुखमस्तकशोधनं बस्तिकण्डूतिदोषघ्नम्** ( ध. २.५२; रा. ६.७९ )
तमालपत्र. **गुण**—कडु, हलके, उष्ण, त्रिदोषघ्न, विष, मूळव्याध, घशाशी येणे, चव नसणे, खाज, बस्तिरोगनाशक, तोंड व डोके यांची शुद्धि करणारे.

**तमालक**—पु., वनस्पति० **तमालः** ( रा. ९.१५ )
द्र० **'तमाल'**
**तमालपत्र** ( ध. २.५२; रा. ६.८० ) तमालपत्र.
**( तमालिका )**—स्त्री., वनस्पति० **ताली** ( रा. परि. ३.३७ ) द्र० **'तमाली'**

दिसण्यासारखे नाही ते त्याला दिसते व दिसण्यासारखे त्याला अन्य कारणाने दिसते. दुसऱ्या पडद्यात दोष असले तर न झालेले त्याला दिसते. झालेले मोठ्या यत्नाने दिसते. जवळचे दूर व दूरचे जवळ दिसते. सूक्ष्म असलेले तर दिसतच नाही. मंडलामध्ये दोष असले तर मंडलासारखे दिसते, दृष्टीच्या मध्ये दोष असेल तर एक वस्तु दोन दिसतात, दोष अनेक ठिकाणी असले तर एका वस्तूच्या अनेक वस्तु दिसतात. दृष्टीच्या आतल्या भागात दोष असले तर लहान वस्तु मोठी व मोठी लहान दिसते. खालच्या बाजूला दोष असले तर जवळचा पदार्थ दिसत नाही व वरच्या बाजूस असलेल्या दोषांनी दूरचे दिसत नाही, बाजूला दोष असल्यास बाजूचे दिसत नाही. हा तिमिररोग होय. तिसऱ्या पटलात दोष असले तर काचबिंदु होतो. त्याने वरचे दिसते. खालचे दिसत नाही. दिसते ते झिरझिरित पातळ वस्त्राने झाकलेले असे दिसते. दृष्टि दोषानुरूप निरनिराळी होते. याची उपेक्षा केल्याने चौथ्या पडद्यात दोष जातात, दृष्टिमंडळ झाकतात व दिसत नाही. दृष्टिदोषाचे तिमिराचे, वातज पित्तज, कफज असे प्रकार होतात ,त्यात दोषाप्रमाणे चिन्हे दिसतात.

**वातजतिमिर**–विसंगत दिसते. हलत आहे, धुरकट, गढूळ, तांबुस असे काही वेळ दिसते, पण लागलीच मूळच्या सारखे दिसते, दृष्टीसमोर जाळी दिसतात. अशा ह्या काचरोगाची उपेक्षा केल्यास दृष्टि तांबुस होते. समोरच्या व्यक्तीचे तोंड नाक नाही असे दिसते, चंद्र, दिवा एक असता अनेक व वाकडी चंद्रकोर किंवा ज्योत तशी दिसत नाही. तो काचदोष वाढल्यावर धुळीने किंवा धुराने दृष्टि व्याप्त झाल्यासारखी होते. तसेच स्पष्ट तांबुस रंगाची बाहुली विस्तीर्ण किंवा संकुचित झालेली अथवा अजीबात नष्ट होते.

**पित्तजतिमिर**–सगळी दृश्ये वीज प्रकाशते तशी किंवा मोर अथवा तित्तिर पक्ष्याच्या पंखाप्रमाणे बहुधा निळसर दिसतात. चंद्रसूर्याभोवती परिघ-मंडळ ( खळे ) दिसते. बाहुली गेल्याने दृष्टि भुंग्या-सारखी काळीभोर, स्निग्ध पण तिच्यात प्रतिबिंब दिसत नाही. ह्या पित्तामुळे ऱ्हस्व दृष्टि होते. कारण फारच थोडे दिसते. पित्ताच्या विदाहामुळे दृष्टि पिवळी व सर्व दृश्येही पिवळी दिसतात.

**कफजतिमिर**–बहुधा स्निग्ध दृष्टि होते व दृश्ये पांढरी दिसतात, यामुळे काचबिंदु होतो तेव्हां सूर्य चंद्रादि निष्प्रभ आहेतसे दिसते. बाहुली जाते म्हणजे कफदोष दृष्टिगत झालेला असतो व दृष्टि साफ नष्ट होते. कमळाच्या पानावरील पाण्याच्या थेंबाप्रमाणे दिसते. सूर्याच्या उन्हात हा बिंदु संकुचित होतो व सावलीत पसरतो. दृष्टीसमोर तांबुस अंधारासारखे दिसते. काचबिंदूमुळे तांबुस किंवा काळी दृष्टि होते व तशीच दृश्ये दिसतात. लिंगनाश झाला म्हणजे बाहुली नष्ट होऊन काच-बिंदूप्रमाणेच दृष्टि निष्प्रभ व अंध होते.

पु., वनस्पति० **तिनिशः** ( सुउ. ५१.३२ ) तिवस.

**तिरस्कृत**–न., **तिरोहितम्** ( चशा. १.८० )

लपविलेले, झांकलेले, भिंतीच्या पलीकडचे.

**तिरीटक**–पु., **वनस्पति० लोध्रः** ( ध. ३.१७५ ) रोध्र.

**तिर्यञ्च**–वि., **वक्रम्** ( सुनि. १.८ ) वाकडे, वेडेवाकडे.

**( तिर्यक् )–पातनयन्त्र**–न., **दीर्घे एकस्मिन् घटे पारदोऽन्यस्मिंश्च जलमुभयोः संयोगार्थं नताधोनालः, येन चुल्ल्यामारोपितादीर्घघटादग्नितापेनोत्थितः पारदोऽन्यस्मिन् पात्रे पतति** ( र.९.१०–१२ )

पारा वाफेने उडवून आडव्या–तिरक्या गतीने शेजारच्या भांड्यात नेणारे यंत्र. दोन मडक्यास एकेक भोक पाडून आडव्या नळीने ती जोडावी. एकात औषधियुक्त पारा व दुसऱ्यात पाणी ठेवावे. पाऱ्याच्या मडक्याला चुलीवर ठेवून अग्नि लावावा. पाऱ्याची वाफ पाण्यात जाऊन पुन्हा पारा होतो.

**( तिर्यग् )–ग्**–वि., **तिर्यग्गामी** ( सुनि. १.८ )

तिरकी जाणारी; तिरकी.

**–गत**–वि., **शाखामार्गगत उन्मार्गगतो वा** ( चनि. ८.३८ )

शाखेमध्ये गेलेला, उन्मार्गगामी.

**–प्रधमनकोष्ठी**–स्त्री., **मृण्मयकोशः, उच्छ्राये द्वादशाङ्गुला मूले च चतुरङ्गुला, तिर्यक् प्रधमनक्रियानुकूल्येन स्थापितमुखा कोष्ठी** ( र. १०.४७ )

ज्या भट्टीला बाजूने वारा घालण्याकरिता भाता बसविलेला असतो अशी भट्टी. बारा अंगुळे उंच व तळात चार अंगुळे असणारी.

**–फला**–स्त्री., **वनस्पति० जन्तुका** ( ध. ४.८८ ) ( रा. ३.१२७ )

खाजकुहिलीसारखी पण वाकडी शेंग असलेली लांब व पुष्कळ पानांची वेल.

**–योनि–**स्त्री., पश्वादियोनिः ( चनि. १.३५ ) पशु इत्यादी मांद्यांची योनि.

**तिल**–पु., न., **तैलधान्य०** ( चसू. २७.३० ) ( सुसू. ४६.३९ ) ( ध. ६.१२२ ) तेलाचे धान्य.

**कृष्णसितेति द्विविधः, पीतहरितलोहिता इति केचित् ( ड ) सर्वेषु कृष्णस्तिलः प्रधानः ( सु )**
तिळाचे काळे व पांढरे असे दोन प्रकार, काही पिवळे हिरवे लाल म्हणतात, सर्वात काळे तीळ मुख्य.

**मधुरः, कटुकः, ईषत् कषायः, तिक्तः, सांग्राहिकः, दंत्यः, पथ्यः, अग्निमेधाजननः, अल्पमूत्रः, व्रणशोधनः, उष्णः, पित्तकरः, बल्यः, स्निग्धः, व्रणे लेपने पथ्यः, त्वच्यः केश्यः अनिलहा**
( सुसू. ४६.३९ )

**कफपित्तकृत्** ( चसू. २७.३७ ) **हिमस्पर्शः**
( ध. ६.१२२ )

हिं.––तिल.

म.––**तीळ.**

गु.––तल.

बं.––तिल.

ता.––नूवू.

तीळ. **गुण**–गोड तिखट थोडे तुरट कडु स्निग्ध जड उष्ण थंडस्पर्शी त्वचा केश दांत व्रण यांना हितकर बलकर मळ घट्ट करणारे पथ्यकर अंगावर दूध आणणारे भूक व धारणाशक्ति वाढविणारे, कफपित्तकर.

न., **परिमाण०** ( चकि. १० (३) २५ ) एक वजन.

पु.,–**त्वग्रोग० पित्तले नरे पित्तस्य औष्ण्यात् त्वचि तिलाकारं चिह्नं जायते** ( चवि. ८.९७ )
तीळ त्वचेचा रोग. पित्तप्रकृति मनुष्याला त्वचेवर तिळाच्या आकार व रंगाचे चिन्ह उमटते.

**–कण**–पु., **भर्जिततिलः** ( चसू. ४.१५ ) भाजलेले तीळ.

**–कन्द**–पु., **वनस्पति० तिलकन्दः** ( रापरि. ७.५२ ) कण्हेरीच्या पानासारख्या मोठ्या व तीन तीन पानांची पुष्कळ कंद असलेली आंबट वेल.

**गुणाः–मधुरः, शीतः, पित्तघ्नः, श्वासकासपित्तप्रकोपविषव्रणहरः** ( रापरि. ७.५४ )

**गुण**–गोड, थंड, पित्तनाशक, श्वासकास, विष, व्रणहर.

**–कल्क**–पु., **तिलानां कल्कः** ( सुचि. १.६५ ) तिळांची चटणी.

**व्रणरोपणस्तिलकल्कः** ( सुचि. १.६७ सुसू. ११.२२ ) व्रण भरून आणणारी तिळांची चटणी.

**शोधनस्तिलकल्कः** ( सुचि. १.६७ ) व्रण शुद्ध करणारी तिळांची चटणी.

**–काम्बलिक**–पु., **कृतान्न० तिलप्रधानः काम्बलिकः**
( चसू. १३.८५ )
दही तीळ घालून तयार केलेले कढण. दही व तीळ यांचे पातळ केलेले कालवण.

**–कालक**–पु., **क्षुद्ररोग० त्वक्स्थाः तिलाभाः कृष्णाः अवेदनाः पिटिकाः** ( सुसू. १२.१० )
त्वचेवरच्या तिळासारख्या काळ्या व वेदना नसलेल्या पुळ्या.

**गुह्यरोग० संनिपातेन गुह्ये पक्वानि मांसानि कृष्णीभूय समन्ततो विशीर्यन्ते, ते तिलकालकाः**
( असंउ. ३८ )
सन्निपाताने जननेन्द्रियाचे मांस पिकून काळे होऊन बाजूबाजूने झरू लागते हा विकार.

**–कुन्तल**–पु., **तिलकाण्डम्** ( असंसू. ३९.१० ) तिळाच्या झाडाचे कांडे.

**–क्षार**–पु., **तिलस्य क्षारः** ( चसू. ३.१४ ) तिळाच्या पंचांगाचा ( जाळून ) केलेला क्षार.

**–चित्रपत्रक**–पु., **वनस्पति० तैलकन्दः** ( रापरि. ७.५० ) **द्र० तिलकंद**

**–ज**–न., **स्नेह० तैलम्** ( ध. ६.१२५ ) तिळापासून झालेले तेल.

**–जीवन**–न., **जीवनं जलम्, तेन तिलजीवनं तिलक्वाथपर्यायः, तिलक्वाथः, तिलमज्जा**
( र. २५.८५ )
तिळाचा काढा. तिळाच्या बीचा मगज.

**–तैल**–न., **तिलात् कृष्टं तैलम्** ( चसू. १३.१२ ) तिळाचे काढलेले तेल.

**तिलेषु भवं तैलं तच्च स्थावरस्नेहोत्तमम्, गुणाः–आग्नेयमुष्णं, मधुरं, मधुरविपाकं, बृंहणं, प्रीणनं, व्यवायि, सूक्ष्मं, विशदं, गुरु, सरं, विकाशि, वृष्यं, त्वक्प्रसादनं, शोधनं, मेधामार्दवकरम्**
( सुसू. ४५.११२ )

तिळाचे तेल. हे वनस्पतींच्या तेलात उत्तम. **गुण**– गोड पचनानंतर गोड उष्ण जड सारक सूक्ष्म चिकटपणा स्वच्छ करणारे आवडणारे तृप्ति करणारे पौष्टिक शरिरात न पचताच सर्वत्र व्यापून नंतर पचणारे संधिबंधने शिथिल करणारे शुक्रधातूला हितकर शोधन शरीर घटक मऊ करणारे त्वचा मृदु चांगली ठेवणारे धारणाशक्ति वाढविणारे.

**–नाल**–पु., **तिलकाण्डम्** ( सुसू. ११.११ )
तिळाचे कांडे.

**–नालज**–वि., **तिलनालदाहात्कृतः यथा क्षारः** ( चचि. १३.१७० )
तिळांच्या काड्या जाळून केलेला क्षार.

**–परिपीडन**–न., **चक्रम् ; तिलपरिपीडनक्रियोपयुक्तम्** ( सुचि. ४.२८ ) घाणा.

**–पर्ण**–न., **वनस्पति० चन्दनम्** (ध. ३.१; रा. १२.१)
चंदन.

**( –पर्णी )**स्त्री.,–**वनस्पति० व्रीहिः** ( रा. १६.१०९ )
तांदुळाचा प्रकार.
**बदरकः** ( इन्दु. असंउ. १० ) लहान बोर.
**चोरकः श्रीहस्तिनी** (ड. सुसू. ४६.२३९) चोरओवा.
**हुल्हुलः इति ख्यातः** ( चक्र. चचि. ३.२६७ )
तेल निघणारी वनस्पती.
पु., **वनस्पति० श्रीवेष्टकः** ( रा. १२.१९३ );
( ध. ३.१३३ ) धूप, राळ.

**–पर्णक**–न., **वनस्पति० चन्दनम्** ( ध. ३.१ ) चंदन.

**–पर्णिक**–न., **वनस्पति० तैलपर्णिकः सरलरसः** ( सुक. ६.१४ ) सरळ देवदाराचा रस.

**–( पर्णिका )**–स्त्री., **शाक० हुल्हुलिका**
( चसू. २७.९७ ) एक भाजी.
**चोरकः, श्रीहस्तिपर्णी** ( सुसू. ४६.२२१ )
( र. ११.५२–५७ ) चोरओवा.

**–पिष्ट**–न., **आहारद्रव्य०** ( चसू. १३.२४ )
तिळाचे पीठ. खाण्यातले द्रव्य.

**–पीडक**–न., **यन्त्र० तिलानां तैलनिष्पादनोपयोगि यन्त्रम्** ( चसू. २५.२७ ) घाणा.

**–भेद**–पु., **वनस्पति० खस्तिलः** (ध. ६.१२०) खसखस.

**–मषी**–स्त्री., **तिलभस्म, अरुंषिकानामके शिरोरोगे लेपनार्थमुपयुज्यते** ( असंउ. २८. )
तिळाची मषी. ( काळी राख ) खवड्यांवर उपयुक्त.

**–वासी**–स्त्री., **वनस्पति० व्रीहिः** ( रा. १६.१०८ )
तांदुळाचा वर्ग.

**–विकृति**–स्त्री., **कृतान्न० मोदकादिः मयूराण्डकादिः** ( हे अहसू. ६.३४ ) ( ड सुसू. ४६.३८१ )
तिळाचे बनवलेले आहारातील पदार्थ मोदक इत्यादी.

**–शाक**–न., शाक० ( चसू. २७.१०९ )
भाजी. तिळाच्या पानांची.

**–संभव**–न., **स्नेह० तैल** ( ध. ६.१२५. )
तिळाचे तेल.

**तिलक**–पु., **वनस्पति० गुणाः–अस्य त्वक्कषाया, मधुरा उष्णा ( रा ) अयं स्निग्धो, लघुः, पुंस्त्वघ्नो बल्यो वातपित्तकफघ्नः, पुष्टिकरो हृद्यो मेदोविवर्धनः दन्तरोगकृमिशोफव्रणरक्तदोषघ्नः** ( ध. ५.१५८ )
हिं.—तिलकपुष्प.
**म.—तिलपुष्पक.**
गु.—तिलकवृक्ष.
छत्रीच्या आकाराच्या सुकल्यानंतरही ताज्या सारखे दिसणाऱ्या वसंतऋतूत येणाऱ्या फुलांचा वृक्ष. **गुण**– तुरट, मधुर, उष्ण, स्निग्ध, लघु, पुरुषत्वनाशक, बलकर, वातपित्तनाशक, हृदयाला हितावह, मेद वाढवणारा, दातांचे रोग, कृमी, सूज, व्रण आणि रक्तदोषनाशक.
**अक्षम्** ( ध. २.३० ) पादेलोण.
**लोध्रः** ( ध. ३.१५७ ) रोध्र.
**तिलकालकः** ( र. २४.४० )
तीळ ( कातडीवरचे ) त्वचेचा रोग.
**त्वग्रोग०** ( चसू. १८.२५ ) त्वचेचा रोग.

**( तिलकी )**–स्त्री., **वनस्पति० शङ्खपुष्पी** ( ध. ४.११३ )
शंखपुष्पी.

**तिलनी**–स्त्री., **वनस्पति० व्रीहिः** ( ध. ६.१०२ )
( रा. १६.१०९ ) तांदुळाचा वर्ग.

**तिलाङ्कितदल**–पु., **वनस्पति० तैलकन्दः**
( रापरि. ७.५० ) तेलाचा कांदा.

**तिलातस्याद्युपनाह**–पु., **स्वेद० केवले वाते उपयुज्यते** ( ड ) सुचि. ३२.१२ )
शेकण्याचे पोटीस. तीळ अळशी इत्यादींचे पोटीस.

**तिलादिकल्क**–पु., **योग० श्वदंष्ट्राविषजित्** ( असंउ. ४६. )
तीळ इत्यादींची चटणी. कुत्र्याचे विष कमी करणारी.

**तिलादिलेप**–पु., **किञ्चित् भृष्टतिलाः सर्षपयुक्ताः मातुलुङ्गरसयुक्ताः । लेपाद् अक्षिरागरुजोर्हरः** ( सुउ. १७.८८–८९ )

तीळ इत्यादींचा लेप. तीळ थोडे भाजून मोहरी घालून महाळुंगाचा रसयुक्त लेप. याने डोळ्याची लाली व दुखावा कमी होतो.

**तिलोत्सेधतनु**–वि., तिलोत्सेधप्रमाणम् ( चचि. १ (३).१६ )
तिळाइतके जाड व लहान प्रमाणाचे.

**तिल्वक**–पु., वनस्पति० लोध्रः ( ध. ३.१७५ ) रोध्र.
पट्टिकारोध्रः ( सुचि. १४.५ ) रोध्राचा प्रकार.

**–घृत**–न., घृत० उदररोगे विरेचनार्थमुपयुज्यते ( सुचि. १४.१० )
उदररोगात रेच होण्याकरिता देतात.

**–घृतचतुर्थ**–वि., तिल्वकघृतं चतुर्थं येषु तानि, हरीतकीचूर्णप्रस्थेत्यादि ( सुचि. १४.१० ) गव्ये पयसि महावृक्षक्षीरेत्यादि ( सुचि. १४.१० ) चव्यचित्रकेत्यादि ( सुचि. १४.१० ) वातव्याध्युक्त-तिल्वकघृतम् ( सुचि. ४.२७ )
वातव्याधीमध्ये सांगितलेले तिल्वक घृत चवथे आहे. हरीतक्यादि महावृक्षादि चव्यादि ह्या तीन घृतांच्या प्रमाणेच जवळ जवळ सारख्या गुणाचे हे चवथे आहे.

**–सर्पिस्**–न., लोध्रादिसिद्धं घृतम्, एतद्वातरोगेषु स्नेहविरेचनार्थमुपयुज्यते ( सुचि. ४.२७ )
लोध्र इत्यादी सिद्ध तूप. हे वातव्याधीत स्निग्धरेचका-करिता उपयुक्त.

**तिष्ठत्**–वि., ऊर्ध्वीभवन् ( ड. सुउ. ४२.१२५ )
उठून, उभे राहून.

**तिष्य**–पु., नक्षत्र० पुष्यनक्षत्रम् (चवि. ८.९) पुष्यनक्षत्र.

**तिस्रैषणीय**–वि., अध्याय० तिस्रैषणाशब्दोऽस्मिन्नस्तीति चरकसूत्रस्थानगतैकादशोऽध्यायः ( चसू. ११.१ )
अध्यायाचे नाव. तीन एषणा–आकांक्षा हा शब्द ज्यात आहे तो.

**तीक्ष्ण**–पु., झटिति कार्यकारी गुणः ( चशा. ६.१० ) अग्निगुणभूयिष्ठो वीर्यसंज्ञको गुणः ( सुसू. ४१.११ ) शोधने शक्तिः ( हे अहसू. १.१८ ) राजिका-मरिचादिष्वनुभूयमानो गुण० तैजसद्रव्यगुणः ( सुसू. ४१.४ (३)
द्रव्यस्य शोधने कर्मणि शक्तिः, गुण० तस्य कर्मणि दाहपाककरत्वं, स्रावणत्वं च ( सुसू. ४६,५१८ )
वि., शीघ्रकारि, मन्दविपरीतः सूचीव भिनत्ति ( अरुणः ) ( अहसू. १.१८ ) मुखे दुःखोत्पादकम् ( सुसू. ४५.१९९ )
कोपनम् ( सुउ. ६२.९ ) शीघ्रतरदोषस्रावणकारि यथा विरेचनं द्रव्यं तीक्ष्णं भवति ( सुचि. ३३.३३ )
तीक्ष्ण. झटकन कार्य करणारा गुण. अग्निगुणाधिक वीर्य नावाचा गुण. शोधन करण्याची शक्ति. मोहरी मिरी इत्यादीमध्ये अनुभवाला येणारा गुण. आग्नेय-द्रव्यांचा **गुण** व त्याची **कर्मे**–पिकवितो, आग, स्राव करतो. तावडतोब–लवकर म्हणजेच मंदाच्या उलट कार्य करणारा सुईसारखा भेदक, तोंडात दुःख संवेदना निर्माण करणारा, कोप करणारा, अधिक लवकर दोषांचा स्राव करणारा, जसे विरेचक द्रव्य. ते तीक्ष्ण असते.
पु., वनस्पति० कुशः ( रा. ८.२०७ )
दर्भासारखे गवत.
कुन्दुरुः ( ध. ३.१३१ ) ( रा. १२.१९० )
फार व तीक्ष्ण वास असलेली तीक्ष्ण वनस्पती. पालक.
क्षुवकः ( रा. परि. ९.४० ) नाकशिंकणीचा प्रकार.
न., वनस्पति० मरीचम् ( र. १२.६४–७३ ) मिरे.
खनिज० लोहम् ( ध. ६.२६ ) लोखंड.
**( तीक्ष्णा )**–स्त्री., वनस्पति० कपिकच्छूः ( ध. १·१५१ ) ( रा.३.२०२ ) खाजकुहिली.
चविका ( ध. २.७७ ) ( रा. ६.११६ ) चवक.
तेजस्विनी ( ध. १.२६६ ) ( रा. ३.३९२ )
मालकांगोणी प्रकार.
पिप्पली ( र. ११.५० ) पिंपळी.

**–कण्ट**–पु., वनस्पति० धन्वयासः ( रा. ३.२६ )
धमासा.
इङ्गुदी ( रापरि. ८.१८ ) हिंगणबेट.

**–कण्टक**–पु., वनस्पति० बर्बुरः ( रापरि. ८.१२ )
बाभूळ.
करीरः ( ध.५.९९ ) नेपती.

**–( कण्टका )**–स्त्री., कन्थारी ( रापरि. ८.२० )
तीक्ष्ण वास व काटे असणारी वनस्पती.

**–कण्टकमुखी**–स्त्री., एषणीशस्त्र० ( सुसू. ८.११ )
सळईसारखे कांट्यासारखे टोक असलेले शस्त्र. सुईसारखे, दाभणासारखे शस्त्र.

**–कन्द**–पु., वनस्पति० पलाण्डुः ( रा. ७.१०० ) ( ध. ४.७१ ) कांदा.

**–क्षार**–पु., त्रिविधक्षारेष्वेकः ( सुसू. ११.१३ )
तीन क्षारांपैकी क्षार.

**-गन्ध**-पु., वनस्पति० शिग्रुभेदः नीलशिग्रुः द्र० शिग्रुः (रा. ७.६२, ध. ४.४१) शेवगा प्रकार.
**वनस्पति० कुन्दुरुः** (ध. ३.१३१) द्र० 'तीक्ष्ण'
**व्रणगन्धविशेषः** (सुसू. २८.९-१०) व्रणाचा वास.

**(तीक्ष्णगन्धा)**-स्त्री., **शोभाञ्जनकः** (ड. सुउ.२३.४) शेवगा.
**वनस्पति० कन्थारी** (रापरि. ८.२०) द्र० कंटका.
**श्वेतवचा** (ध. १.१०; रा. ६.१०) द्र० वचा
**अतिविषा** अतिविष.
**राजिका** (ध. ४.६०) मोहरी, सरसू.

**-तण्डुला**-स्त्री., वनस्पति० पिप्पली (२.७३) पिंपळी.

**-पत्र**-पु., वनस्पति० तुम्बुरुः (ध. २.४२) तीक्ष्ण पाने व फळे असलेली सुगंधी वनस्पती.

**-पर्णिका**-स्त्री., वनस्पति० तुम्बुरुः (र. १६.९९-१०२) द्र० तीक्ष्णपत्र

**-पावक**-पु., रोग० तीक्ष्णाग्निः (भस्मकः) (चचि. १५.५०) भस्मकरोग.

**-पुष्प**-न., वनस्पति० लवङ्गम् (रा. १२.८५) लवंग.

**-(पुष्पा)**-स्त्री., वनस्पति० केतकी (रापरि. १०.१.) केवडा.

**-फल**-पु., वनस्पति० तुम्बुरुः (ध. २.४२) द्र० तीक्ष्णपत्र
**तेजःफलः** (रापरि. ११.१७) काटेरी वृक्षाचे सुगंधी फळ.

**-(फला)**-स्त्री., वनस्पति० राजक्षवकः (ध. ४.४३) (रा. १६.७०) मोहरी.

**-मञ्जरी**-स्त्री., वनस्पति० नागवल्ली ताम्बूलवल्ली (ध. परि. ३.३) नागवेल. खाण्याचे पान.

**-मुख**-पु., पारदयोग० **पारदः सुवर्णं बिडलवणं हरितालं बोलः कान्तलोहं मण्डूरोऽभ्रकं गन्धकं माक्षिकं चेति। सर्वे एते कुमारीरसेन मर्दितगजपुटे परिपाच्याः। अयं अर्शसां नाशनः** (र. १५.६८)
पाऱ्याचे औषध. पारा, सोने, बिडलवण, हरताळ, बोळ, पोलाद, मंडूर, अभ्रक, गंधक, सुवर्णमाक्षिक, ही सर्व कोरफडीच्या रसात खलून गजपुट द्यावे. मूळव्याधनाशक.

**-मूल**-पु., वनस्पति० शिग्रुः (रा. ७.६०) शेवगा.
**कुलञ्जः** (रा. परि. ६.११) सुगंधी मुळाची मुखरोगनाशक वनस्पती,

**-लोह**-न., लोह० खरं, सारं, हन्नालं तारावट्टं वाजिरं काललोहाभिधानं चेति तीक्ष्णलोहं षड्विधं विद्यते (र. ५.८०) (सुचि. १०.११)
पोलाद. खर, सार, हन्नाल, तारावट्ट, वाजिर आणि काललोह असे ६ प्रकारचे असते.

**-वल्क**-पु., वनस्पति० तुम्बुरुः (ध. २.४२) द्र० 'तीक्ष्णपत्र'

**-विष**-वि., तीक्ष्णं विषं यस्य स तीक्ष्णविषः कीटः, **तद्दष्टलक्षणम्, तद्यथा ज्वरोऽङ्गमर्दो रोमाञ्चो, वेदना, छर्द्यतीसारस्तृष्णा, दाहो, मूर्च्छा, विजृम्भिका, वेपथुः, श्वासो, हिक्का, शीतं (दारुणम्) पिडकोपचयः, शोफो, ग्रन्थयो मण्डलानि** (सुक. ८.१९-२३)
तीक्ष्ण विष असलेला किडा. **लक्षण**-ज्वर, अंग दुखणे, रोमांच, वेदना, ओकारी, अतिसार, तहान, दाह, मूर्च्छा, जांभई, कंप, श्वास, उचकी, जोरांत थंडी, अंगावर पुळ्या, सूज, गांठी, चकंदळे.

**-वृक्ष**-पु., वनस्पति० पीलुः (असंसू. १६.३९) पीलू.

**-वेगार्त**-वि., तीक्ष्णवेगपीडितः (सुउ. ३९.९४) ज्वरादिकांच्या तीव्र वेगाने पिडलेला.

**-शूका**-स्त्री., वनस्पति० यवः (ध. ६.७८) जव.

**-सार**-पु., वनस्पति० करीरः (ध. ५.९९) नेपती.
स्त्री.,-वनस्पति० शिंशपा (रा. ९.१९८) शिसव.

**तीक्ष्णक**-पु., वनस्पति० सर्षपः (रा. १६.६८) मोहरी.

**तीक्ष्णाग्नि**-वि., लक्षण० दीप्ताग्निः (सुचि. ३३.५५) वाढलेला पाचक अग्नी. तीव्र अग्नी.
पु., **स गुर्वप्यन्नं पचति तथा सर्वापचारसहश्च जाठराग्निः** (चवि. ६.१२)
सर्व तऱ्हेचे अपचार अपथ्याचे अन्नही पचवणारा पाचक अग्नी.
**विविधेषु विक्रियापन्नेष्वग्निषु पित्तदोषजनितोऽयं तीक्ष्णो जठराग्निः** (सुसू. ३५.२४)
दूषित अशा त्रिविध जाठराग्नींपैकी पित्तदोषदुष्ट तीक्ष्ण जठराग्नी.

**तीक्ष्णायस**-न., लोह० तीक्ष्णमायसम् (चचि. १(३).१६) पोलाद.

**तीर्थ**-पु., उपाध्यायः (अरुण) गुरुः (हे अहसू. १.२८) उपाध्ये, गुरू.
न., **नद्यादिघट्टम्** (ड. सुक. ३.१०) नदी इत्यादिकांचा घाट.

**तीव्र**–न., उग्रम्, इन्द्रियोद्वेजकम् ( चइ. १२.२३ )
इंद्रियांना उद्वेग आणणारे.
**खनिज० तीक्ष्णलोहम्** ( रा. १३.३० )
पोलाद धातु.

( **तीव्रा** )–स्त्री., **वनस्पति० सुरसा** ( रा. १०.७७ )
तुळस.
**तरटी** (रापरि. ८.३२) तांबड्या बियांची वनस्पती.
**तेजस्विनी** ( ध. १.२६६ रा. ३.३९३ )
मालकांगोणी.
**यवानी** ( ध. २.९४ ) ओवा.
**तेजस्विनी** ( रा. ३.३९३ ) मालकांगोणी.
**गण्डदूर्वा** ( ध. ४.१४५ ) द्र०' **दूर्वा** ' गांठीदूर्वा.

–**कन्द**–पु., **वनस्पति० सूरणः** (रा. परि. ७.६) सूरण.

–**गन्धा**–स्त्री., **वनस्पति० यवानी** ( ध. २.९४ ) ( रा. ६.१४१ ) ओवा.

–**ज्वाला**–स्त्री., **वनस्पति० धातकी** ( रा. ६.१५२ )
धायटी.

–**बलि**–पु., **अपक्वः पशूपहारो मद्योत्कटः**
( ड. सुउ. ६०.३७ )
अपक्व मांसाच्या पशूचा–लहान पशूचा भरपूर मद्यासह बली.

–**मात्सर्य**–न., **लक्षण० तीव्रद्वेषः** ( चनि. ७.७( १ )
तीव्र द्वेष.

**तीव्रावी**- परिव० स्त्री., **अतीव प्रसववेदना**
( काखिल. ११.४४ )
जोरात येणाऱ्या वेणा, अतिशय प्रसववेदना.

**तुकाह्वया**–स्त्री., **वनस्पति०** ( असंउ. २ ) वंशलोचन.

**तुगा**–स्त्री., **वनस्पत्यङ्ग० तुगाक्षीरी** ( अहसू. १५.१२ )
वंशलोचन.
**भैषज्य० वंशलोचना, वंशलोचनानुकारि पार्थिवं द्रव्यम्** ( ड ) सुउ. ५२.१७ )
वंशलोचनासारखे पार्थिव द्रव्य.
**भैषज्य० वंशरोचना** ( ध. २.५५ ) वंशलोचन.

–**क्षीरी**–स्त्री., **निर्यास० वंशरोचना**
( चचि. १.(१)६८ ) वंशलोचन.

**तुगाख्या**–स्त्री., **निर्यास० तुगा, वंशरोचना**
( सुउ. ४५.३२ ) वंशलोचन.

**तुङ्ग**–पु., **वनस्पति० पुन्नागः** ( चक्र. चसि. १०.२२ )
वंशलोचन, पुन्नागपुष्प, माड, उंडीण, हळद, तिळवण.
न., **वनस्पति० पद्मकेसरम्** ( ध. ४.१६५ )
कमळकेसर.

( **तुङ्गा** )–स्त्री., **निर्यास० वंशरोचना** ( रा. ६.८६ )
वंशलोचन.
**शमी** ( ध. ५.९५ ) शमी.

( **तुङ्गी** )–स्त्री., **वनस्पति० अजगन्धा** ( ध., २.१०० )
तिळवण, कानफोडी, तुळस.

–**क्षीरी**–स्त्री., **वनस्पति० वंशरोचना** ( ध., २.५५ )
वंशलोचन.

–**नास**–पु., **सविषकीट० गुणाः–प्राणनाशनः, तेन दष्टस्य सर्पवत् तीव्रा वेदनाः, सान्निपातिका रोगाश्च भवन्ति दंशश्च रक्तपीतसितारुणो भवति क्षाराग्निदग्धवच्च प्रतीयते** ( सुक. ८.१५–१८ )
( असंउ. ४३ )
विषारी किडा. प्राणनाशक. तो डसला तर सर्पविषाप्रमाणे तीव्र वेदना त्रिदोषविकार होतात. **दंश**–तांबडा, पिवळा, पांढरा, लालसर, होतो. क्षार किंवा अग्नीने जळाल्यासारखा दिसतो.

**तुङ्गिनी**–स्त्री., **वनस्पति० सहस्रवीर्या** ( रा. ४.४४१ )
( ध., १.२०३ ) मोठी शतावरी.

**तुण्ड**–न., **मुखम्** ( सुक. ३.४ ) **मुखाग्रम्**
( इन्दु. असंउ. १०. )
तोंड. तोंडाचे अग्र.

–( **तुण्डी** )-स्त्री., **वनस्पति० बिम्बी** ( ध., १.२०२ )
तोंडली.
**मधुरबिम्बी** ( ध. १.२०२ रा. ७.३०४ )
गोड तोंडली.

–**नाभ**–पु., **कीट० प्राणनाशकः कीटः** ( असंउ ४३ )
विषारी किडा. प्राणनाशक.

–**नाम**–पु., **सविषकीटः** ( सुक. ८.१५–१८ )
विषारी किडा.

–**विष**–वि., **तुण्डे विषं यस्य सः, वरटीशतपदीशूकशृंगिभ्रमरादयः तुण्डविषाः** ( सुक. ३.५ )
ज्यांच्या नांगीत विष असते असे प्राणी; गांधीलमाशी घोण मद्गुर माशाची स्त्री, भुंगा यांचे विष नांगीत असते.

**तुण्डाहत**–न., **सर्पेण अदंष्ट्रया कृतो दंशः** ( वैशसि. )
सर्पाने दाढेवाचून केलेला दंश.

**तुण्डि**–स्त्री., **वातेनाध्मापितायाः सरुजाया नाभेस्तुण्डिरिति नाम** ( असंउ. २. )
वाताने फुगलेली पीडायुक्त बेंबी.

**–केर**–न., वनकार्पासी, वनकार्पासीसमुद्भवं फलम्, एतत् फलं जले पिष्टं पाययेत् क्षतजतृष्णाशमनार्थम् ( सुउ. ४८.२७ )
रानकपाशी, रानकपाशीचे फळ–बोंड. हे फळ उरः-क्षती मनुष्याला लागलेल्या तहानेवर पाण्यात वाटून पाजावे.

**–केरफला**–स्त्री., वनस्पति० बिम्बी ( ध. १.२२ )
तोंडली.

**–( केरी )**–स्त्री., वायव्यः कीटविशेषः ( असंउ. ४३ )
वातप्रकृतीचा किडा.
**वनस्पति० वनकार्पासिका** ( सुनि. २.१० ) ( असंनि. ७. ) रानकपाशी.
**वनकार्पासीफलतुल्याकारशोथतया इयं रोगे निरूढा । तालुगतरोगविशेषः** ( सुसू. २५.८ )
टाळूला होणारा रोग.

**–केरिका**–स्त्री., वनस्पति० कार्पासी ( रापरि. ४.४५ )
कपाशी.
**कण्ठगतव्याधिः, लक्षणानि–कंठे हनुसंध्याश्रितः कार्पासीफलाकारः पिच्छिलो मंदरुक् कठिनश्च शोफो भवति, स नाम्ना तुंडिकेरिका इत्युच्यते** ( असंउ. २५ )
घशातला रोग–**लक्षणे**–हनुवटीच्या सांध्यात कपाशीच्या फळासारखी बुळबुळीत, कठीण, थोडी वेदना असलेली सूज येते ती.

**–नाभि**–स्त्री., नाभिरोग० मुखयुक्तनाभिः ( सुशा. १०.४३ )
बेंबीचा विकार. वाताने बेंबी फुगते आणि पिकून फुटते तो विकार.

**तुण्डिका**–स्त्री., वनस्पति० बिम्बी ( ध. १.२०२ )
तोंडली.
**वनकार्पासीफलम्** ( र. २९.१२१–२२ )
रानकपाशी.

**तुत्थ**–न., खनिज० तुत्थकम् ( ध. ३.१४५ )
मोरचूद.

**( तुत्था )**–स्त्री., वनस्पति० नीलिनी ( ध. १.२३२ )
काळा दाणा.
**महानीली** ( रा. ४.३५३ ) मोठा काळा दाणा.
**एलाभेदः सूक्ष्मैला** ( ध. २.४४ ) द्र० 'एला'
वेलदोडा.

**–खर्पर**–न., मयूरतुत्थम् ( र. २.१३४ ) मोरचूद.

**तुत्थक**–न., खनिज० मयूरतुत्थम् ( सुचि. ९.६१ )
**गुणाः–कटुः, तिक्तं कषायं उष्णं ( रा ) शीतं ( ध ) चक्षुष्यं, रसायनं, रुच्यं, दीपनं, पुष्टिवर्धनं, वान्तिकरं दृष्टिरोगश्वित्रविषवेगत्वग्दोषविनाशनम्** ( ध. ३.१४५ )
**इदमेव मयूरतुत्थं खर्परिकातुत्थमित्युच्यते** ( चचि. ७.१०८ )
**ऊषकादिगणे** ( सुसू. ३८.३७ ) **प्रक्लिन्नवर्त्मनि नेत्ररोगप्रकारे तुत्थकं कज्जलतुल्यभागं ताम्रपात्रे घृष्टं सर्पिर्युतमञ्जनं कार्यम्** ( सुउ. १२.५३ )
हिं.—नीलाथोथा.
म.—**मोरचूत.**
गु.—मोरथुथु.
बं.—तूतिया.
ता.—तुरिचि.
मोरचूद. **गुण**–कडु तिखट तुरट उष्ण ( रा ) थंड ( ध ) डोळ्याला हितकर रुचि उत्पन्न करणारा अग्निदीपक पुष्टि वाढवणारा सर्वधातुपरिपोषण कार्य करणारा, वान्ती करणारा; दृष्टिरोग, कोड, त्वचारोग, विषवेगनाशक. याला खर्परिकातुत्थ म्हणतात. ऊषकादिगणातील एक; हे तांब्याच्या भांड्यात काजळाच्या समभाग घेऊन तुपात घोटून अंजन करावे.

**तुद्यमान**–वि., लक्षण० पीड्यमानम् ( चसू. १७.३९ )
पीडा होत असलेले. पीडित.

**तुन्द**–वि., स्थूलः ( र. १६.१५० )
स्थूल, जाड, जाडजूड.
**न., शारीर० उदरम्** ( र. १८.१९४ )
पोट, उदर.

**तुन्दिलफला**–स्त्री., वनस्पति० त्रपुसम् ( रा. ७.२४६ )
तवसे, काकडी प्रकार.

**तुन्नसंज्ञा**–स्त्री., सेवनी ( असंउ. ३१ )
शिवण, सुई.

**तुन्नसेवनी**–स्त्री., सीवनप्रकारेष्वेकः यथा वस्त्रं पाटितं तन्तुवायकः संदधाति तद्वत् ( सुसू. २५.२२ )
शिवण्याचा प्रकार. कपडा फाटल्यावर दोऱ्याने शिवतात तसे.

**तुमुलस्वन**–वि., प्रचण्डगर्जितः ( मेघः ) ( सुसू. ६.३१ )
प्रचंड आवाज, प्रचंड गर्जना करणारा मेघ.

**तुम्ब**–पु., यन्त्र० अलाबूः ( चचि. २९.३७ )
भोपळा, तुंबा; दुध्या.

( **तुम्बी** )–स्त्री., वनस्पति० कटुकालाबुनी
( ध. १.१७० ) कडुभोपळा; कडुदुध्या.
सरलः ( ध., ३.७८ ) ( रा. १२.१३६ )
सरल, देवदार.
इक्ष्वाकुः ( चक. ३.३ ) कडुदुध्या.
तिक्तालाबूः, गुणाः–तिक्ता, कटुः, कषाया, अधोभागदोषहरा, कृमिकुष्ठकफानिलहरा, दुष्टव्रणशोधनी
( सुसू. ४५.१२४ )
कडुदुध्या. **गुण**–कडु, तिखट, तुरट, खालच्या भागातील दोषहारक. कृमि, कुष्ठ, कफ, वातहर. व दुष्टव्रणशोधक.

–**बीज**–न., भैषज्य० इक्ष्वाकुफलबीजम्
( चक्र. ३.१५ ) कडुभोपळ्याची बी.

**तुम्वरु**–पु., वनस्पति० तुम्बुरुः ( ध. २.४२ )
( असंसू. ७ ) रान कोथिंबीर, चिरफळ.

–**तैल**–न., स्नेहविशेषः ( ध. ६.१३८–३९ )
एक तेल. रानकोथिंबिरीचे तेल.

**तुम्बिका**–स्त्री., वनस्पति० कटुकालाबुनी ( ध. १.१७० )
( रा. ३.२३४ ) कडुदुधी, कडुभोपळा.

**तुम्बिनी**–स्त्री., वनस्पति० कटुकालाबुनी
(ध. १.१७०) (रा. ३.२३४) कडुभोपळा, कडुदुधी.
कटुतुम्बिनी ( र. १०.७–७६ ) कडुदुधी, भोपळा.

**तुम्बुरुः**–पु., धान्य० ( चसू. २७.३०३ ) कटुर्मधुरस्तिक्तः ( ग. ), उष्णस्तीक्ष्णो वह्निदीपनः, कफवातशूलाऽपतन्त्रोदराऽऽध्मानकृमिगुल्मान्नाशयति
( ध. २.४२ ) वातशूलघ्नः ( चक. ४.१५ )
( सुउ. ४२.६९ )
हिं.—तुंबरु.
**म.—चिरफळ.**
गु.—तुंवरुफल.
बं.—तेजबलेरगाछ.
चिरफळ. तिखट, गोड, कडु, उष्ण, तीक्ष्ण, अग्निदीपक, कफवात, शूल, आचके, उदर, पोटफुगी, कृमि, गुल्मनाशक.

**तुरग**–पु., वनस्पति० अश्वगन्धा ( र. ३०.७९ )
अश्वगंधा. आस्कंद.

–**चर्या**–स्त्री., विक्रमवाञ्छितोपशल्यसंहितासु हयारोहणम् ( सुचि. ११.११ ) घोड्यावर बसणे.

–**प्रिय**–पु., वनस्पति० यवः ( रा. १६.१२४ ) जव.

**तुरगाह्वा**–स्त्री., वनस्पति० घोण्टा ( रापरि. ८.२२ )
बोर. पोफळ ( सुपारी )

**तुरगी**–स्त्री., वनस्पति० अश्वगन्धा ( ध. १.२७२ )
आस्कंद.

**तुरङ्गगन्धा**–स्त्री., वनस्पति० अश्वगन्धा
( सुउ. ४१.४१ ) आस्कंद.

**तुरङ्गवर्चस्**–पु., अश्वपुरीषम्, अस्य स्वरसो रक्तपित्तशमनः ( सुउ. ४५.३१ )
घोड्याची लेंडी, मळ. त्याचा रस रक्तस्रावनाशक.

**तुरङ्गिका**–स्त्री., वनस्पति० जीमूतकः ( रा. ३.२४४ )
देवडांगरी.

**तुरङ्गी**–स्त्री., वनस्पति० घोण्टा ( रापरि. ८.२२ )
बोर. सुपारी.

**तुरुष्क**–पु., सुगन्धिद्रव्य० धूपभेदः सिह्लकः ( चक्र. चचि. २८.१५३ (असंउ. १) गुणाः–कटुस्तिक्तोष्णः स्निग्धः स्वादुः कटुको वातकफपित्तघ्नः ( रा ) कुष्ठाश्मरीमूत्राघातभूतज्वरघ्नः ( ध. ३.२२ )
हिं.—शिलारस.
**म.—शिळारस.**
गु.—शिलारस.
बं.—शिलारस.
ता.—चिलारचं.
शिलारस, शिळारस. **गुण**–तिखट, गोड, कडु, उष्ण, स्निग्ध, त्रिदोषशामक, कुष्ठ, मूतखडा, मूत्राघात व भूतज्वर नाशक.
वनस्पति० यवानी ( ध. २.९४ ) ओंवा.

**तुर्यांश**–पु., चतुर्थांशः ( असंशा. ६ )
चतुर्थांश. चौथा हिस्सा.

**तुलसी**–स्त्री., वनस्पति० सुरसा ( ध. ४.५० ) गुणाः–कटुः, तिक्ता, हृद्योष्णा, दाहपित्तकारिणी, दीपनी, कुष्ठकृच्छ्ररक्तपित्तपार्श्वशूलहिक्काश्वासकासविषपूतिगन्धकफनाशिनी । सितासितकुसुमभेदाद्द्विविधा
( र. १८.१७४–७६ )
हिं.—तुलसी.
**म.—तुळस.**
गु.—तुलसी.
बं.—तुलसी.
ता.—तुलसी.
फा.—रेहान्.

तुळस. **गुण**–तिखट, कडु, उष्ण, अग्निदीपक, हृदयाला हितकर, कुष्ठ, लघ्वीला त्रास, रक्तस्राव, फासळ्यात शूळ, उचकी, श्वास, कफ, खोकला, विष, कुजका वास नाशक, पित्त, व दाहकारक. २ प्रकार. पांढरी व काळी, फुलावरून हे प्रकार.

**तुला**–स्त्री., **मान० पलशतम्** ( असंक. ८ )
वजन. चारशे तोळे.

**तुलिक**–पु., **कार्पासगोलकावृतमुखी तृणकाष्ठादिशलाका** ( र. २२.१२६ )
कापसाच्या बोळ्याने तोंड–( टोक ) वेढलेली गवत किंवा काडी यांची सळई.

**तुलिनी**–स्त्री., **वनस्पति० लक्ष्मणा** ( रापरि. ७.५५ )
पांढरी रिंगणी.

**तुल्ययोनित्व**–न., **एकहेतुजन्यत्वं यथा चक्षुस्तेजोजन्यं रूपं च तेजोजन्यमिति चक्षूरूपयोस्तुल्यतेजोजन्यत्वम् । आयुर्वेदे तुल्ययोनित्वस्य सिद्धान्तः इन्द्रियार्थग्रहणे स्वीकृतः । तद्यथा—'' इन्द्रियाणामिन्द्रियार्थानां च पाञ्चभौतिकत्वेऽपि यस्य भूतस्य यत्रेन्द्रिये आधिक्यं तेन तेनेन्द्रियेण तस्य तस्यैव गुणाः शब्दादयो गृह्यन्ते । इन्द्रियेण चक्षुरादिना रूपादिकमात्मीयं मानव उपादत्ते । तद्यथा–तैजसं चक्षुस्तैजसमेव रूपमादत्ते । तुल्ययोनित्वादेकभूतहेतुत्वात् । भूतं हि स्वयोनिमभिधावति जलमिव जलम्** ( ड ) सुशा. १.१५ )
दोन गोष्टींच्या मुळाशी एकच कारण असणे. जसे डोळा व रूप ही दोन्ही एका तेजापासून झाली आहेत. दोघांच्या ठिकाणी तुल्ययोनित्व आहे. आयुर्वेदात तुल्ययोनित्व हा सिद्धांत स्वीकारल्याने इंद्रिये व इंद्रियांचे विषय ( अर्थ ) ही पांचभौतिक असूनही ज्या ज्या भूताचे आधिक्य इंद्रियात आहे त्या त्या इंद्रियाने त्या त्या भूताच्या गुणांचे–शब्द स्पर्शादि गुणांचे ग्रहण होते. तैजस इंद्रिय जे डोळा त्याने तैजस गुण जे रूप त्याचेच ग्रहण होते. कारण दोघांचे कारणरूप भूत एक आहे.

**तुल्यशीला**–स्त्री., **समानस्वभावा** ( सुचि. २४.१३० )
समान स्वभावाची.

**तुल्या**–स्त्री., **वनस्पति० आढकी** ( ध. ६.९३ ) तूर.
**खनिज० सौराष्ट्री** ( ध. ३.१०५ ) तुरटी.

**तुवरः**–पु., **वनस्पति० यावनालभेदः तुवरयावनालः द्रव्यं यावनालम्** ( रा. १६.१७१ )
जोंधळा, ज्वारी, दादर.

न., **कषायरसम्** ( र.५.३० ) तुरट रस.

**( तुवरी )**–स्त्री., **वनस्पति० आढकी** ( ध. ३.१०५ ) तूर.
**खनिज० सौराष्ट्री** ( ध. ३.१०५ ) तुरटी.

**–धान्य**–पु., **वनस्पति० यावनालभेदः तुवरयावनालः** ( ध. ६.१०८ ) ( रा. १६.१७१ )
**द्र० 'यावनाल'**
जोंधळा, ज्वारी. दादर.

**–यावनाल**–पु., **वनस्पति० जूर्णाविशेषः** ( रा. १६.१७१ )
जोंधळा. ज्वारी, दादर.

**तुवरक**–पु., **वनस्पति० पश्चिमसमुद्रभूमिषु पलाशानुकारी वृक्षः; अस्य स्नेहो महाव्याधिषूपयोज्यः** ( सुचि. ३१.५ ) **तद्गुणाः–महाप्रभाव उत्कृष्टतमः कुष्ठमेहापहस्तस्य मज्जानो मात्रया पीता नरं शोधयन्ति** ( सुचि. १३.२०–३४ ; असंउ. ४९ )
हिं.—चौलमोगरा.
**म.—कडुकवठ, कंवठी.**
कडुकवठ. पश्चिम समुद्राच्या काठावरील जमिनीत ( कोंकणात ) पळसासारखा वृक्ष असतो. त्याचे तेल महारोगावर उपयुक्त. **गुण**–कुष्ठ, प्रमेहनाशक, मोठे प्रभावी, योग्यप्रमाणात घेतलेला फळाचा मगज उत्कृष्ट कोष्ठशुद्धि करणारा आहे.

**(तुवरिका)**–स्त्री., **भैषज्य० कांक्षी** ( र. ३०.६४–६५ )
तुरटी.
**नेत्ररोगेष्वक्षिक्षालनार्थमुपयुज्यते** ( असंउ. २०.२५३ )
नेत्ररोगात डोळे धुण्याकरिता योजतात.

**–तैल**–न., **तुवरकः पश्चिमार्णवतीरजोऽयं वृक्षः तत्फलतैलं सर्वेषु कुष्ठेषूपयुज्यते** ( असंचि. २१ ) **गुणाः–उष्णं, मधुरं, कषायं, तिक्तानुरसं, वातकफकुष्ठमेदोमेहकृमिप्रशमनमुभयतोभागदोषहरं च** ( सुसू. ४५.१२२ )
कडुकवठीचे तेल. फळाचे तेल. **गुण**–गोड, तुरट, कडु, ( अनुरस ) उष्ण, वात, कफ, कुष्ठ, मेद, प्रमेह, कृमि शामक, दोन्ही मार्गांनी दोष काढणारे वामक व रेचक.

**–तैलप्रयोग**–पु., **तैलस्य पञ्चाहिकप्रयोगः कुष्ठहरः प्रथमः; तस्यैव खदिराम्बुसिद्धस्य विशिष्टावस्थे कुष्ठे द्वितीयः प्रयोगः, तदेव सर्पिर्मधुखदिरकषायविधिना प्रयुज्यमानं तृतीयप्रयोगत्वेन व्यपदिश्यते । परोऽपि**

पञ्चाशद्दिनावधिको नस्यप्रयोगो रासायनिकश्चतुर्थः स्मृतः । किंच मज्जप्रयोगः पञ्चमः । अञ्जनप्रयोगश्च षष्ठः ( सुचि. १३.२०–३५ )
तुवरक किंवा कडु कवठीच्या तेलाचे प्रयोग—कुष्ठ-नाशक असा पांच दिवस तैलसेवन हा पहिला. खैराच्या काढ्याने सिद्ध केलेल्या त्याच तेलाचा कुष्ठाच्या विशिष्टावस्थेत दुसरा प्रयोग, तेच तेल तूप मधयुक्त खैराच्या काढ्याशी देणे हा तिसरा प्रयोग. पन्नास दिवस पर्यंत रासायनिकविधीमध्ये नस्य म्हणून चवथा प्रयोग. ह्याच्या मज्जेचा उपयोग हा पाचवा आणि अंजन म्हणून वापरणे हा सहावा प्रयोग होय.

**तुवरकास्थि**–न., तुवरकबीजं ( असंचि. २१ )
कडु कवठीचे बी.

**तुवरानुरस**–न., तुवरोऽनुरसतयाऽऽस्वाद्यते यस्मिंस्तत् तुवरानुरसम्, अन्ये तु तुवरशब्देन कषायमाहुस्तेन किञ्चित्कषायानुरसमित्यर्थः
( चक्र. चचि. २२.२६ )
पदार्थ खाताना त्याचा उत्कृष्ट रस प्रथम कळतो व त्याच्या मागाहून जेव्हा तुरट रस लागेल तेव्हा त्याला तुवरानुरस म्हणतात. तुरट अनुरस.

**तुष**–पु., धान्यत्वक् ( सुचि. ५.१८ र. १४.६० )
धान्याची साल. तूस, कोंडा.

**तुषाम्बु**–न., सन्धान० यत्सतुषैर्यवैः क्रियते । तद्गुणाः– दीपनं हृद्यं हृत्पाण्डुक्रिमिरोगनुत्
( सुसू. ४५.२१३ )
हिं.—यवोंकी कांजी.
**म.—जवाच्या कोंड्याचे पाणी.**
जवाची कांजी; जवाचे तूस. कोंडा न काढता ते आंबवून तयार केलेले आंबट पाणी. ते अग्निदीपक हृदयाला हितकर, हृदयरोग, पांडु, कृमिनाशक.

**तुषार**–पु., वनस्पति० चीनकः ( ध. ३.३१ )
( रा. १२.६३ ) कापूर.
कर्पूरः ( ध. ३.३१ रा. १२.५६ ) कापूर.
अवश्यायः ( अहसू. २.४० ) दंव; बर्फ.

**तुषोद**–न., आसव० तुषोदकम् ( ध. ६.२५१ )
कोंडा न काढता जव आंबवून केलेले पाणी. जवांची कांजी.

**तुषोदक**–न., आसुत० ( चसू. २७.१९१ )
कोंडा न काढलेल्या जवांची कांजी,
सतुषयवकाञ्जिकम् ( सुसू. ४४.४०–४४ )
कोंडा न काढलेल्या जवांची कांजी.

**तुष्ट**–पु., वनस्पति० तिन्दुकः ( ध. ५.४० ) टेंभुरणी.

**तुष्टि**–स्त्री., मनःसंतोषः ( सुसू. १५.५ ( १ )
संतोष. मनाची संतुष्टता.
वनस्पति० ऋद्धिः ( ध. १.१८५. रा. ५.१८८ )
अष्टवर्गापैकी एक.

**तुहिन**–पु., वनस्पति० कर्पूरः ( ध. ३.३१ ) कापूर.

**तुहिनोदक**–न., हिमपानीयम् ( सुउ. ४७.५५ )
बर्फाचे पाणी.

**तूणि**–पु., वनस्पति० गुणाः–कटुस्तिक्तो वृष्यः पुष्टिकरो वीर्यदो, कण्डूकुष्ठव्रणगण्डमालासंनिपातरक्तविकार-दाहशिरोरोगश्वेतकुष्ठानि त्रिदोषाँश्च हन्ति
( ध. ३.१८ )
हिं.—टूना.
**म.—देवदारी.**
बं.—हण्डीत्रिक्षा.
नांदुरखी. देवदारी. **गुण**–तिखट, कडु, शुक्राला हितकर, पुष्टिकर, वीर्यदायक, कडु, कुष्ठ, व्रण, गंडमाळा, संनिपातज्वर, रक्तविकार, दाह, डोक्याचे रोग, पांढरे कुष्ठ, तिन्ही दोषनाशक.
वातरोग० ( सुसू. ४६.३७२–७३ ) वातरोग.
स्त्री., वनस्पति० नीलिनी (ध. १.२३२) काळादाणा.

**तूणीक**–पु., वनस्पति० तूणिः (ध. ३.१८) द्र० 'तूणि'.

**तूद**–न., फलविशेषः, अम्लं परूषकफलसदृशं गुणत्वेऽपि ततोऽल्पान्तरगुणम् ( चसू. २७.१३५ )
हिं.—शहतूत.
**म.—शहातूत.**
गु.—शेतूत.
बं.—तूत.
ता.—मळुकट्टेचेटि.
तूत, सतूत, सतूक, सैतूक, आंबट गोड फालशाच्या फळासारख्या गुणाचे पण त्यापेक्षां थोड्या कमी गुणांचे.
वनस्पति० तूलम् ( ध. ५.६४ ) द्र० ' तूल '
लक्षण० तोदनम्, तुद्यतेऽनेन दन्तः इति तूदम् यद्वा तुदति इति तूदम् ( आम्रातकम् )
( अहसू. ६.१३८ )
आंबाडा. आंबट असल्याने त्याने दांताना वेदना होतात म्हणून त्याला तूद म्हणतात.

**तूनसेवनीसंधि**–पु., अस्थिसंधिप्रकारः ( असंशा. ५ ) कवटीच्या व कमरेच्या हाडांचा सांधा.

**तूनी**–स्त्री., रोग० ( र. १८.११६–१७ ) पक्वाशयाद्गुदोपस्थं तीव्ररुजो वायुश्चरन् तूनी भवेत् ( असंनि. ११ सुनि. १.८६ ) मलाशय व मूत्राशयात वायूने उत्पन्न झालेल्या वेदना अनुक्रमाने गुद व शिश्न यात जाऊन ते फुटल्याप्रमाणे वाटते या विकाराला तूनी म्हणतात.

**तूर्णक**–पु., शालिभेदः ( चसू. २७.८ ) साळीचा प्रकार.

**तूर्णम्**–( अव्य० ) शीघ्रम् ( सुचि. ३६.१३ ) शीघ्र, लवकर, त्वरेने.

**तूल**–न., वनस्पति० गुणाः–मधुरमम्लं वृष्यमग्निकरं बल्यं वर्ण्यं सरं वातपित्तकफदाहनाशनम् ( ध. ५.६४ ) निळया देठाचे सुंदर दिसणाऱ्या फुलांचे गोड फळांचे गोड आंबट लागणारे झाड.

–**फल**–न., शाल्मलीफलादि । व्रणबन्धनद्रव्यम् ( सुसू. १८.१६ ) सावरीचे फळ इत्यादी व्रण बांधण्याला उपयुक्त द्रव्य. पु., वनस्पति० अर्कः ( रा. १०.२६ ) रुई.

–**वृक्ष**–पु., वनस्पति० शाल्मली (रा. ८.२११) सावर.

**तूर्ष्णीभाव**–पु., स्तब्धता ( धनि. ७.७ ( ३ ) स्तब्धता. गप्पपणा. क्रिया थांबणे.

**तृण**–न., वनस्पति० कुशकाशादि ( सुक. ३.१३ ) गवत, दर्भ, कास, मोळ इत्यादी. पु.,–वनस्पति० कुशः (रा. ८.२०८) दर्भाचा प्रकार.

**( तृणी )**–स्त्री., वनस्पति० सठी ( रा. ६.८७ ) कचोरा.

–**कुङ्कुम**–न., वनस्पति० कुङ्कुमम् ( रा. १२.२३ ) गुणाः–कटुरुष्णं, कफवातशोफकण्डूतिपामाकुष्ठामदोषघ्नम् ( रा. १२.२३ ) केशर. **गुण**–तिखट, उष्ण, कफवात, सूज, खाज, खरुज, कुष्ठ, आमदोष नाशक.

–**केतुक**–पु., वनस्पति० वंशः ( ध. ४.१३७ ) बांबु, टोकर, कळक, वेळू.

–**गौर**–न., वनस्पति० तृणकुङ्कुमम् ( रा. १२.२३ ) गवती केशर.

–**ग्रन्थि**–स्त्री., वनस्पति० हिमा ( रापरि. ३.१३ ) सोन्यासारख्या पानांची फुलांची व तशीच दिसणारी हिमालयातली वनस्पती.

–**धान्य**–न., वनस्पति० कुरी ( रा. १६.१७९ ) गवती धान्य.

–**निम्ब**–पु., वनस्पति० नेपालनिम्बः ( रा. ९.५२ ) काडे चिराईत.

–**पञ्चमूल**–न., ( सुसू. ३९.८ ) 'तृणाख्यं पित्तजिद्दर्भशरकाशेक्षुशालयः । एतैरेकीकृतं पञ्चमूलं तु तृणसंज्ञितम् ॥ ( ध. ७.२६ ) पाच गवतांच्या मुळांचा समूह. दर्भ बाण कास ऊस व साळ ( तांदूळ ) यांची मुळे. पित्तनाशक.

–**पत्रिका**–स्त्री., वनस्पति० इक्षुदर्भा (रापरि. ८.४७) लव्हाळे.

–**पत्री**–स्त्री., वनस्पति० गुण्डासिनी (रापरि. ८.६६) जाड चापट गवतीपाने असलेली, मुळांचा गुच्छ असलेली पाण्यातली वनस्पती.

–**पुत्रिक**–पु., पुरुषाकृतिभूयिष्ठोऽपुरुषः, व्यवायेच्छायुक्तः किन्तु व्यवायसामर्थ्यहीनः ( चशा. ४.३१ ) पुरुषाकृती असून पौरुष नसलेला. संभोग करू इच्छिणारा पण करू न शकणारा पुरुष. षंढ.

–**पुष्प**–न., वनस्पति० तृणकुङ्कुमम् ( ध. ३. ) ( रा. १२.२३ ) गवती केशर.

–**( पुष्पी )**–स्त्री., वनस्पति० सिन्दुरी ( रापरि. १०.१९ ) लाल शेंदरी रंगाची फुले असणारी वनस्पती. शेंदरी.

–**पूली**–स्त्री., तृणमयी पुरुषाकृतिः ( चचि. २( १ ).१८ ) गवताची पुरुषाची आकृति.

–**बल्वजा**–स्त्री., वनस्पति० बल्वजा ( रापरि. ८.४० ) एक गवत.

–**बीज**–पु., वनस्पति० श्यामाकः ( ध. ६.८८ ) वऱ्याचे तांदूळ. सावा.

–**बीजोत्तम**–पु., वनस्पति० श्यामाकः ( ध.६.८८ ) सावा, वऱ्याचे तांदूळ.

–**मूल**–न., सुगन्धितृणमूलम् ( चचि. ४.१०३ ) ( सुचि. ३७.३१ ) सुगंधी गवताचे मूळ.

**( –मूली )**–स्त्री., केतकी ( सुक. ६.२१ ) केवडी.

–**राज**–पु., वनस्पति० तालः ( ध. ५.६८ ) ताड. नारिकेलः (रा. ११.१०५ ) नारळाचे झाड. नारळ.

–**वालुक**–न., वनस्पति० उशीरम् ( ध. ३.१४ ) काळा वाळा.

–**शीता**–स्त्री., वनस्पति० महाराष्ट्री ( रापरि. ४.१३) मराठी.

**-शुण्ठ**-पु., वनस्पति० गुण्ठः ( ध. १.८३ )
पसरट कंदाचा गोल रोहिस गवताचा प्रकार.

**-शून्ी**-स्त्री., केतकी ( ड सुक. ६.२१ ) केवडी.

**-शून्य**-न., फल० केतकी, अस्य फलमासवार्थमुपयुक्तम् ( चसू. २५.४९ ) केवड्याचे फळ.

**-शून्यकन्द**-पु., केतकीमूलम् ( सुचि. १८.१० )
केवड्याचे मूळ.

**-शून्यफल**-न., फल० केतकीफलम्
( सुसू. ४६.१९४ ) केवडीचे फळ.

**-शोषक**-पु., सर्पविशेषो राजिमान्
( सुक. ४.३४(३ ) एक सर्प. रेषा असलेला.

**-संज्ञक**-पु., पञ्चानां तृणमूलानां समाहारः
( सुसू. ३८.७५ ) पांच गवती मुळांचा समूह.

**तृणाम्ल**-न., वनस्पति० लवणतृणम् ( रापरि. ८.५७ )
आंबट कांडे असणारे खारट गवत.

**तृणास्त्र**-न., वनस्पति० तृणकुङ्कुमम्
( ध. ३. रा. १२.२३ ) गवती केशर.

**तृणेक्षु**-स्त्री., वनस्पति० बल्वजा ( रापरि. ८.४० )
एक गवत.

**तृणोत्तम**-पु., वनस्पति० उखलः ( रापरि. ८.४६ )
पशूंना आवडणारे उत्तम गवत.

**तृणोत्थ**-न., वनस्पति० तृणकुङ्कुमम्
( ध. ३ रा. १२.२३ ) गवती केशर.

**तृणोद्भव**-न., वनस्पति० नीवारः ( रा. १६.१३९ )
साळीच्या जातीचे तृण धान्य.

**तृणोलप**-न., तृणगुल्मम् ( हे अहृसू. २९.१३ )
गवताची गंज.

**तृतीयक**-पु., विषमज्वर० ( चचि. ३०.६६ )
तिसऱ्या दिवशी येणारा ज्वर. तिजारे.
**अस्थिमज्जगो दोषस्तृतीयकज्वरं कुरुते । अस्मिन् ज्वरे तृतीयदिनभावित्वमस्ति । केचिद्विषमज्वरं भूताभिषङ्गोत्थं वदन्ति । तृतीयकस्तु त्रिविधः । कफपित्तात् त्रिकग्राही वातकफात्मकः पृष्ठग्राही, वातपित्ताच्छिरोग्राही** ( चचि. ३.६७-७१ )
तिजारे. अस्थि व मज्जा यातले दोष तृतीयक ज्वर करतात. काहींचे मत असे की भूतबाधेने विषमज्वर येतो. तिजारे ३ प्रकारचे. कफपित्तज माकडहाडापासून, वातकफात्मक पाठीपासून येतो तर वातपित्तात्मक डोक्यापासून ज्वर येतो.

**तृप्ति**-स्त्री., संतोषः अयमाहारगुणानां श्रेष्ठः
( चसू. २५.४० )
संतोष. आहाराच्या सर्व गुणांत श्रेष्ठ.
**लक्षण०** ( चसू. ४.८ ) **विंशतिश्लेष्मविकारेष्वेकः** ( चसू. २०.१७ ) वीस कफरोगांतील एक.
**अनन्नाभिलाषः** ( र. १८.४४ )
अन्नाची अनिच्छा.

**-घ्न**-वि., **तृप्तिरोगघ्नः** ( चसू. ४.८ ) तृप्तिरोगनाशक.

**तृष्**-स्त्री., **द्विविधलङ्घनान्तर्गतशमन० उदकवर्जनम्**
( अहृसू. १४.७ )
तहान शामक उपचार. दोन प्रकारच्या लंघनातील एक. पाणी वर्ज्य करणे. तहान निर्माण करणे.
**जलपानेच्छा** ( सुउ. ६१.१६ )
तहान. पाणी पिण्याची इच्छा.

**तृषा**-स्त्री., जलेच्छा ( चसू. १४.१४ )
तहान. पाणी पिण्याची इच्छा.

**तृष्णा**-स्त्री., **लक्षण० पानीयसेवनेच्छा** ( चसू. १६.५ ) पिपासा ( चनि. ४.४८ ) **इच्छाद्वेषस्वरूपा वासना** ( चशा. १.३४ ) **व्याधिः** ( चचि. २२.१ ) **हेतुः संप्राप्तिश्च-भयश्रमबलसंक्षयैः पित्तलैश्च चितं पित्तं सवातमूर्ध्वं प्रसरत् तालुप्रपन्नं सत् तृष्णां जनयति** ( मा ) **रसवाहिनीश्च धमनीर्जिह्वामूलगलतालुकक्लोम्नः संशोष्यातिबलौ पित्तवातौ तृष्णां कुरुतः** ( चचि. २२.६ ) **पूर्वरूपम्, ताल्वोष्ठकण्ठास्यानां विशोषणं दाहश्च, तथैव संतापो मोहो भ्रमो विप्रलाप इति पूर्वरूपाणि तृष्णोत्पादकाले विशेषतो भवन्ति** ( सुउ. ४८.७ ) **भेदाः-तिस्रः दोषजाः, क्षतजा क्षयजा आमजा भक्तजा चेति सप्त तृष्णाः** ( मा ) **लक्षणानि—वातजतृष्णायां क्षामास्यता, स्रोतोनिरोधः शीताभिरद्भिश्च विवृद्धिः, शंखयोः शिरसि वा तोदः, विरसवक्त्रता । पित्तजतृष्णायां मूर्च्छा, विलापदाहा रक्तेक्षणत्वं प्रततश्च शोषः, शीताभिनन्दनं, परिदूयनमुपतापोऽन्नविद्वेषः मुखतिक्तता च । कफजतृष्णायां निद्राधिक्यं गुरुत्वं मधुरास्यता तृष्णार्दितत्वं भक्तद्वेषः प्रसेकश्च । क्षतजतृष्णायां रसक्षयः आभीक्ष्ण्येनाम्भःपानेऽपि सुखप्रत्ययाभावः हृत्पीडा कम्पः शोषः शुष्कता तृष्णा च । आमजतृष्णायां त्रिदोषलिङ्गयुक्तेयं तृष्णा हृच्छूलनिष्ठीवनसादकर्त्री; अन्नजा तृष्णा । स्निग्धाम्ललवणं गुर्वन्नं भुज्यमानमाशु इमां तृष्णां करोति ।** (मा;)

तृष्णाया अन्ये प्रकाराः तच्छमनोपायाश्च–श्रमोद्भवा तृष्णा–श्रमजन्यतृष्णायां मांसरसो गुडोदकमथवा मन्थः प्रशस्तः ( सुउ. ४८.३० ) स्नेहपानजा तृष्णा–अस्यामुष्णं जलं प्रभूतं पातुमिष्यते ( सुउ.४८.३१ ) मद्यपानजा तृष्णा-पाटलोत्पलकन्दमुद्गपर्णीसाधितं पिप्पलीमिश्रहिमशीतलं जलं मद्यतृष्णायां प्रशस्तम् ( सुउ. ४७.५१ ) उष्णोद्भवा तृष्णा–उष्णोद्भवां तृष्णां सुशीतं सशर्करं सेक्षुरसं जलं हन्ति ( सुउ. ४८.३२ ) व्याधिपीडितः पुरुषः जलं काङ्क्षन् यदि जलं न लभते, तर्हि स आश्वेव मरणमाप्नुयाद्दीर्घरोगं वा लभेत । तस्मात् बहुभ्योऽपि रोगेभ्यः पूर्वमेव तृष्णां जयेत् ( चचि. २२.६० ) सर्वतृष्णासु पित्तशमनो विधिः कार्यः

( सुउ. ४८.३३ )

तहान. **लक्षण**–पेय-पाणी पिण्याची इच्छा. इच्छाद्वेषरूपी वासना.

**रोग–कारण, संप्राप्ति**–भय श्रम बलक्षय पित्तवर्धक द्रव्यांच्या उपयोगाने पित्त वातासह वर टाळूत जाऊन तहान निर्माण करिते. हे अति बलवान वातपित्त रसवाहिनी धमनी जिभेचे मूळ गळा टाळू क्लोम यांना सुकवून तहान करतात. **पूर्वरूप**–टाळू ओठ गळा तोंड सुकणे आग तसेच उकाडा भ्रम बडबड बुद्धि न चालणे. **प्रकार सात.** दोषजा ३ क्षतजा, क्षयजा, आमजा, भोजनजा. **दोषजात** त्या त्या दोषांची लक्षणे होतात. **क्षतजामध्ये** कितीही पाणी प्याले तरी समाधान होत नाही. **आमजात** तिन्ही दोषांची चिन्हे होतात. **उपचार**–श्रमजन्य तहानेवर मांसरस गूळपाणी किंवा पेज उपयुक्त. स्नेहपान केल्याने झालेल्या तहानेवर पुष्कळ ऊनपाणी पाजावे. **मद्यपानाच्या तहानेवर**–निळ्या कमळाचा कंद रानमूग यांचा काढा पिंपळी घालून खूप थंड करून द्यावा. **उष्णतेने झालेली तहान**–खूप थंड पाणी साखर किंवा उसाचा रस घालून प्यावे. **व्याधीने पिडलेल्या मनुष्याला तहान** लागली असता पाणी न दिले तर तावडतोब मरण येते किंवा दीर्घकालीन रोग जडतो–चालू रोग लांबतो. म्हणून अशा रोग्याला प्रथम तहानेचे उपचार करणे अतिशय जरुरीचे असते, ते करून नंतर मूळ रोगाची चिकित्सा करावी. प्रत्येक तृष्णेमध्ये पित्तशामक उपाय करावेत.

इच्छाद्वेषस्वरूपा वासना ( चशा. १.१३४ )
इच्छाद्वेषरूपी वासना.

**–घात**–पु., लक्षण० तृष्णाघातज उदावर्तः, अस्मिन् शीतलमन्थयवाग्वादीनां पानं कार्यम्

( सुउ. ५५.३४ )

तहान मारणे, तहान मारल्याने होणारा विकार उदावर्त. थंड कण्हेरी आटवल इत्यादि पेये घ्यावीत.

**–घ्न**–वि., तृष्णां हन्ति हरतीति ( चसू. १.१०९ )
तहान नाहीशी करणारे. तहान शामक.

**–निग्रहजरोग**–पु., तृष्णाया निग्रहो नाम अवरोधः तस्मात् निग्रहाच्छोषोऽङ्गसादबाधिर्यसम्मोहभ्रमहृद्गदा भवन्ति । तत्र सर्वशीतो विधिर्हितः

( असंसू. ५.१४ )

तहान मारली तर घसा सुकतो, अंग गळाल्यासारखे होते, बहिरेपणा भ्रम मूर्च्छा हृद्रोग होतात. सर्व थंड उपचार येथे हितकर.

**–निग्रहण**–वि., तृष्णाशमनः ( चसू. ४.८ )
तहान शमणे. तहान शमविणारी.

**–निग्रहणवर्ग**–पु., ( परिव० ) नागरधन्वयवासमुस्तपर्पटकचन्दनकिराततिक्तकगुडूचीह्रीबेरधान्यकपटोलानीति दशेमानि तृष्णानिग्रहणानि भवन्ति

( चसू. ४.१४ )

**तहान शमविणारी द्रव्ये**–सुंठ धमासा नागरमोथा पित्तपापडा चंदन काडेचिराईत गुळवेल वाळा धणे पडवळ ही दहा.

**–प्रतिषेध**–पु., अध्याय० ( सुउ. ४८.१ )
अध्यायाचे नांव.

**तृष्णाधिक्य**–न., लक्षण० तृष्णाया आधिक्यम्

( चसू. २०.१४ )

तहानेचे आधिक्य. तहान अधिक लागणे.

**तृष्णाभिघात**–न., तृड्वेगविघातजोदावर्तः

( सुउ. ५५.१६ )

तहान मारणे. तहान मारल्यामुळे होणारा विकार. उदावर्त.

**तृष्णारि**–पु., वनस्पति० पर्पटः (रा. ५.६५) पित्तपापडा.

**तृष्णालु**–वि., लक्षण० पिपासायुक्तः ( चचि. ३०.२४४ )
तहानेला, तहान लागलेला.

**तृष्णोपशमनी**–वि., तृष्णाया उपशमनी अपहन्त्री ( चिकित्सा ) ( चवि. ५.२६ )
तहान कमी करणारा ( शमन करणारा) उपचार.

**तृष्यत्**–वि., तृष्णायुक्तः ( चसू. १६.१० ) तहानयुक्त.
तृशारोगवान् (चसू. १४.१८) तहान रोग असलेला.

**तेजन**–न., दीपनम् ( सुचि. २४.५२ )
अग्निदीपन–अग्नि दीप्त होणे.
**वनस्पति॰ मुञ्जतृणम्** ( चचि. १ ( ३ ). ३ )
मुंजागवत, मोळ. जाड दर्भ.

**( तेजनी )**–स्त्री., **वनस्पति॰ मोरटः** ( ध. १.१५ )
मोरवेलीचा प्रकार.
**मूर्वा** ( असंचि. २. ) मोरवेल.
**तेजोवती** ( ध. १.२६६ ) मोठी मालकांगोणी.

**तेजनाह्वय**–पु., **वनस्पति॰ मुञ्जः** ( रा. ८.२०४ )
मुंजागवत, मोळ, जाड दर्भ.

**तेजवती**–स्त्री., **वनस्पति॰ तेजोवती** ( ध. १.२६६ )
मोठी मालकांगोणी.

**तेजस्**–न., **देहोष्मा** ( चचि. १५.३ )
शरिराचा उष्मा, उष्णता.
**त्वक्स्था दीप्तिः** ( ड. सुचि. ३८.५० ) त्वचेचे तेज.
**पित्तोष्मा** (ड. सुउ. ४७.७०–७१) पित्ताची उष्णता.
**रञ्जकपित्तम्** ( सुसू. १४.५ ) **अग्निः** ( सुसू. १४.५)
रंजक पित्त. यकृतातील पित्त.
**पराक्रमः** ( सुसू.४५.९६ ) पराक्रम.

**(तेजः–) पथ**–पु., **जठरानलमार्गः** ( सुसू. ४६.५१३ )
पाचक पित्ताचा मार्ग. पचनमार्ग.

**–फल**–न., **वनस्पति॰ गुणाः–कटु तीक्ष्णं दीपनं बालरक्षाकरं वातश्लेष्मघ्नमरुचिघ्नं च** ( रा. परि. ११.१७ )
काटेरी वृक्षाचे सुगंधी फळ. तिखट तीक्ष्ण दीपक वातकफघ्न रुचि उत्पन्न करणारे मुलाचे रक्षण करणारे.

**(तेजो–) धातु**–पु., तेजः ( सुशा. २.३५ )
शुक्रधातु. ओज.

**–वृक्ष**–पु., **वनस्पति॰ अग्निमन्थभेदः, क्षुद्राग्निमन्थः** ( रा. ९.१३८ ) द्र॰ '**अग्निमन्थ**'
अरणीचा प्रकार. लहान अरणी. टाकळी प्रकार

**–ह्वा**–स्त्री., **वनस्पति॰ तेजस्विनी, तेजोवती** ( सुचि. ९.६१; ध. १.२६६ )
मोठी मालकांगोणी.

**तेजस्विनी**–स्त्री., **वनस्पति॰ गुणाः–दीपनी, पाचनी, रुच्या कफवातघ्नी** ( ध. १.२६६ )
मोठी मालकांगोणी. गुण–दीपक, पाचक, रुचि उत्पन्न करणारी, कफवातघ्न.
**मूर्वा** ( रा. ३.१० ) मोरवेल.

**तेजिनी**–स्त्री., **वनस्पति॰ तेजोवती** ( र. ११.९४; असंशा. ४ ) मोठी मालकांगोणी, तेजबळ.

**तेजिवाह**–पु., **अश्वजाति॰** ( र. ३.१२५ )
घोड्याची एक जात.

**तेजोवती**–स्त्री., **वनस्पति॰ मर्दनिका** ( ड सुचि. २२.२४)
**गुणाः–श्लेष्मवातघ्नी, रुच्या, दीपनी** ( ध. १.२६६ )
हिं.—तेजमल.
**म.—नेपाळी धनिया.**
फा.—तेजबळ.
तेजबळ, कफवातघ्न, रुचकर, अग्निदीपक.
**महाज्योतिष्मती लता** ( सुचि. २४.८ )
मोठी मालकांगोणी.
**काकमर्दनिका** ( ड. सुउ. ५१.२८ ) एक वनस्पती.
**चविका** ( चचि. १७.१४१ ) चवक.

**तेर**–पु., **वनस्पति॰ तैरिणी** ( रापरि. ४.१५ ) तेरणा.

**तेरण**–पु., **वनस्पति॰ गुणाः–तिक्तः शिशिरोऽरुणवर्णकरो व्रणघ्नश्च** ( रापरि. ४.१५ )
तेरणा–कडु थंड व्रणनाशक तांबुस रंग करणारा.

**तैजवल्ली**–स्त्री., **वनस्पति॰ शतावरी** ( रा. ४.४४० )
शतावरी, म्हैसवेल.

**तैजस**–वि., **अग्निगुणनिर्वृत्तः** ( सुशा. १.१९ )
अग्निभूतापासून निर्माण झालेले. तेजासंबंधी.
**अहङ्कारभेदः राजसोऽहङ्कारः** ( सुशा. १.४ )
अहंकाराच्या प्रकारापैकी एक.
**उष्णः** ( सुसू. १४.३ ) उष्ण.
न., **आहारद्रव्य॰ घृतम्** ( रा. १५.२०२ ) तूप.

**( तैजसी )**–स्त्री., **वनस्पति॰ गजपिप्पली** (रा. ६.११७)
गजपिंपळी.

**तैत्तिर**–वि., **तित्तिरस्य संबन्धि मांसरसादि** (चसू. १३.८३ )
तित्तिराचे मांस. मांस रस रक्त मळ इत्यादी.

**तैन्दुक**–वि., **तिन्दुकवृक्षस्येदम्, तिन्दुकवृक्षभवम्** ( चशा. ८.३३ )
टेंभुरणीच्या झाडाचे फळ फूल पान इत्यादी.

**तैमिरिक**–वि., **तिमिरव्याधियुक्तः** ( चसू. १४.१९; सुचि. ३३.१४ )
तिमिर ( दृष्टीचे ) विकार झालेला.

**तैमिर्य**–न., **रोग॰ तिमिरम्; तिमिरमेव** ( र. २३.४६; चचि. १४.११ ) दृ॰

**तैरिणी**–स्त्री., वनस्पति० ( रापरि. ४.१५ ) द्र० 'तेरण'. तेरणा.

**तैर्यग्योन**–वि., तिर्यग्योनिजातो गोगजाश्वादिः तिर्यग्योनिभवः तैर्यग्योनः ( सुउ. ३९.१३ )

तिर्यग्योनि गाय घोडा हत्ती इत्यादींपासून झालेला. तिर्यक्योनीपासून झालेला.

**तैल**–न., आहारद्रव्य० ( चसू. १.७३ ) तिलोद्भवं मुख्यम् एरण्डकरञ्जकुसुम्भादीनां बीजेभ्योऽपि तैलं निष्पद्यते सर्वतैलेषु स्वयोनिवद्गुणकर्माणि भवन्ति, तिलोद्भवतैलगुणाः–स्वादुकषायानुरसोष्णं, सूक्ष्मं, व्यवायि, तीक्ष्णं, पित्तलं, बद्धविण्मूत्रं, बल्यं, त्वच्यं, मेधाग्निवर्धनम् । वातघ्नं न श्लेष्मवर्धनं, संयोगात् संस्कारात् सर्वरोगहरम् ( चसू. २७.२८७ )

तेल. आहातील द्रव्य. तिळापासून झालेले तेल. एरंड करंज करडई इत्यादिकांच्या बियांपासून तेल काढतात. सर्व तेले आपापल्या बीच्या गुणधर्माप्रमाणे असतात. **तिळाच्या तेलाचे गुणधर्म**–गोड; तुरट रस मागाहून असतो; उष्ण तीक्ष्ण सूक्ष्म शरिरात न पचताच प्रथम शिरते व नंतर पचते. त्वचेला बुद्धीला हितकर मळ व मूत्र यांची प्रवृत्ति कमी करणारे पाचकाग्नि वाढविणारे, वातघ्न कफपित्तवर्धक तेल कोणत्याही रोगनाशक औषधांचा संस्कार त्यावर केला तर त्या रोगाचा नाश करते, संस्काराने ते सर्वरोगनाशक आहे.

**तैलात् परं वातघ्नं किञ्चिदपि औषधं नास्ति । व्यवाय्युष्णगुरुस्नेहादिगुणैः संस्काराच्च बलवत्तरं भवति । तत्तु सूक्ष्ममार्गाश्रितान् गदान् क्षिप्रतरं हन्ति । स्नेहेन वातस्य रौक्ष्यं गुरुत्वाद्वातस्य लघुतामौष्ण्याद्वातस्य शैत्यं हत्वा तैलमाशु मनःप्रसादं वीर्यं बलं वर्णं पुष्टिमग्निं च ददाति** ( चसि. १.३० ) **वातश्लेष्मप्रशमनानामग्र्यम्**

( चसू. २५.४० )

तेलापेक्षा श्रेष्ठ असे वातघ्न काहीही नाही. व्यवायी उष्ण गुरु स्निग्धादी गुण औषधांचे संस्कार यांनी ते बलवत्तर होते, ते सूक्ष्मस्रोतसात शिरणारे असते म्हणून लवकरात लवकर रोग नष्ट करिते. तेलाचे वरील गुण वाताच्या गुणांच्या विपरीत असल्यामुळे वाताचा नाश करून मनाची प्रसन्नता वीर्य बल वर्ण पुष्टि व अग्नि प्रदीप्त करते. वातकफ–प्रशमन करणाऱ्या द्रव्यात हे श्रेष्ठ आहे.

**ग्रन्थिनाडीकृमिश्लेष्ममेदोमारुतरोगिषु लाघवदार्ढ्यार्थिक्रूरकोष्ठेषु च देहिषु तैलं विशेषतः शस्यते**

( असंसू. २५.१२–१३ )

गांठ, नाडीव्रण, कृमि, कफ, मेद, वातरोगात हलकेपणा बळकटपणा इच्छिणाऱ्यांना व कोठा अगदी जड असणाऱ्यांना तेल विशेष उपकारक आहे.

**स्नेहनार्थं प्रावृषि तैलं युञ्ज्यात्**

( असंसू. २५.१५–१६ )

पावसाळ्यात शरीर स्निग्ध करावयाचे असल्यास तेल योजावे.

**कृशानां बृंहणाय स्थूलानां कर्शनाय च तैलमेव अलम् । तैलप्रयोगाद् दैत्याधिपतयो निर्विकारा युद्धेऽजरा जितश्रमाः प्राप्तातिबला बभूवुः**

( असंसू. ६ )

कृश पुष्ट होण्याकरिता व स्थूल कृश होण्याकरिता तिळाचे तेल हे एकच पुरेसे आहे. **इतिहास**–दैत्यांचे राजे तेलाच्या सेवनाने युद्धात दृढतेने थकवा न येता लढले व निर्विकार आणि अति बलाढ्यही झाले.

**भैषज्य० सिह्लकम्, शिलारसः इति यावत्** ( र. २१.१३९ ) शिलारस.

**–कन्द**–पु., वनस्पति० **गुणाः–कटुरुष्णो रसबन्धको देहसिद्धिकरश्च, वातापस्मारविषशोफघ्नः**

( रा. परि. ७.५० )

तेल्या कंद. तिखट, उष्ण वातापस्मार विष सूज नाशक. पाऱ्याची गोळी करतो व शरीर निरोगी करतो.

**–गण्डूष**–पु., तैलस्य मुखे धारणम् ( चसू. ५.८० ) **तैलगण्डूषधारणगुणाः–हन्वोर्बलं स्वरबलं वदनोपचयः परं च रसज्ञानमन्ने च उत्तमा रुचिः, अनेन कण्ठशोषो नस्यान्नौष्ठयोः स्फुटनाद्भयम् । दन्ताः क्षयं न यान्ति दृढमूलाश्च भवन्ति नाम्लेन शूल्यन्ते न हृष्यन्ते परानपि खरान् भक्ष्यांश्च भक्षयन्ति च**

( चसू. ५.७८–८० ) ( असंसू. १३.३० )

**दन्तबलरुचिकराणां श्रेष्ठः** ( चसू. २५.४० )

तेलाची गुळणी. एक उपचार. तेल तोंडात ठेवणे. **गुण**–तोंड पुष्ट गोल होते. हनुवटी बळकट होते. स्वर बलवान होतो; रस उत्तम कळतात; अन्नाला उत्तम रुचि असते. घसा लवकर सुकत नाही, ओठ फुटण्याची भीति नाही, दांत क्षीण होत नाहीत, व

पडत नाहीत, उलट बळकट होतात. अतिशय कठीण व अरबडसडबड अन्न तो खाऊ शकतो. आंबटाने दाताला कळ लागत नाही किंवा ते शिवशिवत नाहीत, दांताचे बल व रुचि करणाऱ्या उपचारात गंडूष सर्वश्रेष्ठ आहे.

**–घृत**–न., योग० **द्राक्षाकाश्मर्यादिसिद्धं कटुतैलं मत्स्यमाषदध्यादिसिद्धं घृतं च मिलित्वा तैलघृतं उत्पाद्यते एतद् दीपनं स्नेहनं बल्यं ग्रहणीपार्श्वरोग-प्लीहगुल्मनिवारणं च** ( काकटुतैलक १६.१७ )
**व्योषजात्यादिभिर्दध्ना च सिद्धं तैलघृतमिदं शूला-तिसारविनाशकम्** ( सुउ. ४०.५६ )
तेल तूप,–द्राक्षे शिवण इत्यादींनी सिद्ध मोहरीचे तेल व मासे उडीद दही इत्यादींनी सिद्ध तूप मिळून तेलतूप. हे अग्निदीपक स्निग्ध करणारे बलकर ग्रहणी फासळींच्या वेदना प्लीहा गुल्म नाशक. सुंठ मिरे पिंपळी (व्योष) जाई इत्यादी व दही यांनी सिद्ध तेलतूप शूळ अतिसार नाशक.

**–दान**–न., **तैलस्य दानं, तैलयुक्तो बस्तिः** ( चसि. १.२९ )
तेलाचे दान. तेल देणे. तेलाचा वस्ति देणे.

**–द्रव्य**–न., **कङ्गुणीतुम्बिन्यादि** ( र. १०.७३–७५ )
**तैलद्रव्याणि–कङ्गुणीतुम्बिनीघोषाकरीरश्रीफलकटु-वार्ताकसिद्धार्थसोमराजीबिभीतकअतसीबीजमहा-कालीनिम्बबीजतिलअपामार्गबीजदेवदालीदन्ती-बीजतुम्बुरुअङ्कोलधत्तूरभल्लातकपलाशाः ॥ एतेभ्यस्तैलान्युद्धृत्य रसकर्मण्युपयोक्तव्यानि** ( र. १०.७३ )
**तेलाची द्रव्ये**–मालकांगोणी कडु दोडके गिलके (घोसाळे) नेपती बेल कडुवांगे मोहरी बावची बेहडा अळशी कडुनिंब तीळ आघाडा देवडांगरी जयपाळ धणे अंकोळ धोत्रा भिलावा पळस यांच्या बियांचे तेल पाऱ्याच्या क्रियांमध्ये उपयुक्त आहे.

**–द्रोणी**–स्त्री., **अवगाहार्थे पात्रविशेषः, तैलयुक्ता द्रोणी बद्धगुदे परिस्राविणि चोदररोगे शल्यकर्मा-नन्तरं व्रणित्वेनाध्मानक्लेशनिवृत्त्यर्थमुपयुज्यते** ( सुचि. १४.१७ )
तेलाची डोणी. तेलात बसण्याकरिता एक भांडे, बद्ध गुदोदरात व स्राव होणाऱ्या उदरात शस्त्रकर्म केल्या नंतर, व्रण असल्यामुळे झालेली पोटफुगी व होणारे दुःख नाहीसे होण्याकरिता, धनुर्वात शमनाकरिता.

**–निर्यास**–न., **भैषज्य० जवादि** ( रा. परि. १२.७ )
कस्तुरी.



**–पाक**–पु., **तैलपातनं; विध्युक्ता तैलसिद्धिः** ( र. १२.१४ )
**आसन्नपाके तैले परीक्षणार्थं बलाकायाः पक्ष्मैकं क्षिपेत् । स च यदा भ्रमराङ्गनीलो भवेत् तदा तैलं विपक्वं विद्यात्** ( सुचि. २५.३०–३१ )
तेलाचा पाक–तेल पाडणे, विधीप्रमाणे तेल सिद्ध करणे. तेल तयार होत आले आहे याची **परीक्षा**–त्यात बगळ्याचा एक पंख टाकावा तो जेव्हा भ्रमराच्या अंगासारखा निळा होईल तेव्हा तेल पक्के सिद्ध झाले असे समजावे.

**–पायना**–स्त्री., **शस्त्रतीक्ष्णीकरणार्थं संस्कार० पातुं प्रयोजना ( ड. ) निवृत्तानां शस्त्राणां तत्क्षणाद्द्रव-द्रव्येषु निर्वापणं पायना** ( हाराणचंद्र ) । **पायना त्रिविधा क्षारोदकतैलेषु । तत्र क्षारपायितं शस्त्रं शरशल्यास्थिच्छेदनेषु, उदकपायितं च मांसच्छेदन-भेदनपाटनेषु । तैलपायितं च सिराव्यधनस्नायु-च्छेदनेषूपयुज्यते** ( सुसू. ८.१२ )
तेल पाजणे, तेलाचे पाणी देणे. तेलाने शस्त्र पाणीदार धारदार करणे. शस्त्र तीक्ष्ण धारेचे करण्याकरिता करावयाचा संस्कार; शस्त्र तापवून लाल करून द्रव्यामध्ये बुडवणे. पाणी तीन प्रकारचे क्षारपाणी, पाणी व तेल. **क्षारपाणी**–बाण रुतलेला काढण्यास व हाड कापण्यास उपयुक्त; **पाण्याचे पाणी**–मांसाचा च्छेद घेणे फाडणे इ० उपयुक्त **तेलपाणी**–शीर तोडण्याला स्नायु कापायला उपयुक्त शस्त्राला द्यावयाचे.

**–पेय**–न., **कन्दविष०** ( असंउ. ४० ) द्र० '**कन्दविष**'
विषारी कंदाचे विष.

**–फल**–पु., **वनस्पति० इङ्गुदी** ( रा. परि. ८.१८ )
हिंगणबेट.
**बिभीतकः** ( रा. ११.३२२ ) बेहेडा.

**( फला )**–स्त्री., **वनस्पति० अतसी** (ध. ६.११५) अळसी.
न., **तिलोमास्फोतादि** ( चचि. २६.४८ )
**एरण्डफलतिलादि** ( चसू. ३.१८ )
तीळ अळसी इत्यादी. एरंडफल तीळ इत्यादी.

**–बीज**–पु., **वनस्पति० भल्लातकः** ( रा. ११.२०१ )
भिलावा, बिब्बा.

**–भाविनी**–स्त्री., **वनस्पति० जाती** (ध. ५.१३७) जाई.

**–योनि**–न., **तिलादि, सतैलफलम्, तैलकारणं द्रव्यम्** ( चचि. १५.२२७ )
तीळ इत्यादी तेलयुक्त बीजे, तेलाची कारण द्रव्ये.

तत्राष्टौ सकृज्जाताः स्वरूढदन्ता भवन्ति, अतः शेषा द्विजाः । यावत्स्वेव च मासेषु दन्ता निषिच्यन्ते तावत्स्वहःसूद्भिद्यन्ते । यावत्स्वेव च मासेषु जातस्य सत उद्भिद्यन्ते तावत्स्वेव च वर्षेषु पतिताः पुनरुद्भिद्यन्ते । तत्र मध्ये द्वावुत्तरौ राजदन्तसंज्ञौ भवतः, तौ पवित्रौ, तस्मात्ताभ्यां खण्डे न श्राद्धमर्हति, अपवित्रो हि सः । तयोरुभयतः पार्श्वयोरपि बस्तौ तयोरपि दंष्ट्रे, शेषाः स्वरूढा हानव्या इति चोच्यन्ते, तथाऽधस्तात् । तत्र कुमारीणामाशुतरमल्पाबाधकरं च दन्तजन्म, सुषिरत्वाद्दशानां मृदुस्वभावाच्च, प्रकृष्टकालमाबाधबहुलं तु कुमाराणामाचक्षते, धन्वत्वाद्दशानां स्थिरस्वभावाच्च । दन्तानां निषेकमूर्तित्वोद्भेदवृद्धिपतनपुनर्भावनिवृत्तिस्थितिपरिक्षयचलनपतनदृढत्वदुर्बलताजातिविशेषान्निषेकात् स्वभावान्मातापित्रोरनुकरणात् स्वकर्मविशेषाच्चेत्याचक्षते महर्षयः । नृणां तु चतुर्थादिषु मासेषु दन्ता निषिच्यन्ते । तत्र सदन्तजन्म च पूर्वमुत्तरदन्तजन्म च, विरलदन्तजन्म च, हीनदन्तता च, अधिकदन्तता च, करालदन्तता च, विवर्णदन्तता च, स्फुटितदन्तता चामङ्गल्या भवति । चतुर्विधं तु दन्तजन्माचक्षते सामुद्गं, संवृतं, विवृतं दन्तसंपदिति । तत्र सामुद्गं क्षयि, नित्यसंपातात्, संवृतमधन्यं मलिष्टं, विवृतं वीतमन्नित्यलालोपहतमसंछन्नदन्तत्वादाशुदन्तवैवर्ण्यकरमासन्नाबाधमिति । चतुर्थे तु मासि दन्ता निषिक्ता दुर्बला भवन्त्याशुक्षयिणश्चामयबहुलाश्च, पञ्चमे स्यन्दनाश्च प्रहर्षिणश्चामयबहुलाश्च षष्टे प्रतीपाश्च मलग्राहिणश्च विवर्णाश्च घुणदन्ताश्च भवन्ति, सप्तमे द्विपुटाः स्फोटिनश्च राजिमन्तश्च खण्डाश्च रूक्षाश्च विषमाश्चोन्नताश्च भवन्ति, तथाऽष्टमे मासि सर्वगुणसंपन्ना भवन्ति । पूर्णता समता घनता शुक्लता स्निग्धता श्लक्ष्णता निर्मलता निरामयता किञ्चिदुत्तरोन्नतता, दन्तबन्धनानां च समता रक्तता स्निग्धता बृहद्घनस्थिरमूलता चेति दन्तसंपदुच्यते ( कासू. २०.४७)

**दात**–तोंडामधले कठीण अन्न चावण्याचे साधन असलेला अवयव. ३२ दात. यातील आठ एकदाच उत्पन्न होतात. बाकी चोवीस दोनदा उत्पन्न होतात. **काळनियम**–जन्मापासून जितक्या महिन्यांनी दात येतात तितक्या दिवसात ते वर येतात. जन्मापासून जितक्या महिन्यांनी ते वर येतात



तितक्या वर्षांनी ते पडतात व पुन्हां वर येतात. **नावे**–मधले व पुढच्या वरच्या दोन दातांचे नाव राजदंत, त्यांच्या बाजूचे बस्त; त्यांच्या बाजूचे दोन दंष्ट्रा त्यांच्या बाजूचे सर्व हानव्य होत. असेच खालचे दात समजावे. राजदंत पवित्र होत. मुलींना दात हलके जातात. लवकर येतात. त्रास कमी. कारण मुलीचे दात मऊ अधिक सच्छिद्र असतात. मुलांचे दात जड जातात, वर येण्याला उशीर लागतो व त्रास होतो, ते अधिक घट्ट व स्थिरस्वभावी असतात. दात येणे, त्यांचा आकार वर येणे, वाढणे, पडणे, पुन्हा येणे, पुन्हा न येणे, स्थिर राहणे, क्षीण होणे, हालणे व बळकटपणा, अशक्तता ही सर्व जातींना अनुसरून शुक्रशोणिताच्या गर्भाधानकालाच्या स्थितीवर, आनुवंशिकतेवर, व स्वतःचे दैव आणि बालकाच्या शरिराची वाढ, झीज, गुण, दोष यांवर अवलंबून आहेत. चौथ्या महिन्यापासून दात येतात. जन्मतः दात येणे, प्रथम वरचे दात येणे, दात विरल असणे, कमी येणे, अधिक येणे, अधिक लांब अथवा वेडेवाकडे येणे, रंग चांगला नसणे, फुटलेले असणे हे दोष आहेत. हे अशुभ समजतात. याकरिता शांती करावी. इतर अवयवांच्या न्यूनाधिकतेच्या वेळीही शांती करावी. दातांची उत्पत्ति चार प्रकारची १ **सामुद्ग.** खोलगट २ **संवृत** आत गेलेले ३ **विवृत** बाहेर आलेले. विवृत उघडे व ४ **सर्वगुणसंपन्न** १ मूल क्षयी असेल तर सामुद्ग. हे लवकर पडत असतात. २ संवृत नेहमी घाण राहतात. ३ विवृत उघडे असतात बाहेरची घाण येते, लाळ सुटते, ते सडतात, रंग वाईट होतो. चवथ्या महिन्यात आलेले दात अशक्त असतात. लवकर क्षीण होतात, पडतात, व रोग फार होतात. पांचव्यात आलेले दात हालणारे थंड आंबट स्पर्श सहन न होणारे व अनेक रोग होणारे; सहाव्यात आलेले तिरके मळकट वाईट रंगाचे किडके होतात. सातव्या महिन्यात आलेले दोन पुडांचे फुटीर रेषा असलेले तुकडे होणारे रूक्ष विषम पुढे आलेले असतात. ४ आठव्या महिन्यात येणारे दात सर्वगुणसंपन्न असतात.

**गुण**–सर्व दात सारखे असणे घट्ट व भरीव पांढरे स्निग्ध चिकण निर्मळ निरोगी वरचे दात खालच्या

दातांच्या किंचित पुढे असणे हिरड्या ही अगदी सारख्या असणे तांबड्या स्निग्ध मोठ्या जाड घट्ट व ज्यांच्यात दात अगदी घट्ट बसले आहेत अशा असाव्यात.

**( दन्ती )**–स्त्री., **वनस्पति०** ( ध. १.२२३ ) **गुणाः– कटुका उष्णा तीक्ष्णा दीपनी शोधनी कफवातघ्नी उदरार्शोव्रणाश्मरीशूलामदोषत्वक्दोषहरा च** ( ध. १.२३ )

**अस्याः श्यावानि मूलानि कल्पे उपयोक्तव्यानि** ( चक्र. १२.३ )

हिं.—अजयपालवृक्ष.

**म.—दाती.**

गु.—दाती.

बं.—दन्तीगाछ.

ता.—नाकतेन्ति.

दाती. हिची काळी मुळे उपयोगात आणतात. **गुण**– तिखट उष्ण तीक्ष्ण अग्निदीपक मळशोधक कफवात- नाशक उदर मूळव्याध मूतखडा शूळ आमदोष त्वक्दोषनाशक.

**क्षीरविष०** ( असंउ. ४० ) ( अहसू. १५.४५ ) **द्र० 'क्षीरविषः'** दुधाळ विष.

**हस्तिदंतः** ( चसि. ३.७ ) हत्तीचा दात.

**–काष्ठ**–पु., **वनस्पति० विकङ्कतः** ( रा. ९.५५ ) बेहेकळ. बेहळी.

**दन्तशोधनार्थमुपयुक्तं काष्ठम्** ( सुक. १.२५ ) दातण. दात घासण्याची काडी.

**–काष्ठक**–न., **वनस्पति० आहुल्यम्** (रा.परि. ४.३३) एक वनस्पती.

**–खादन**–न., **लक्षण० परस्परं दन्तपीडनम्; दन्तैर्दन्तानां पीडनम्**

दात खाणे, दातांवर दात दाबणे.

**–खादिन्**–वि., **लक्षण० यस्तु मारुतप्रकृतिः, स सुप्तः सन् दन्तान् किटिकिटायते** ( सुशा. ४.६० )

झोपेत दात खाणे. दातावर दात आपटून किटकिट आवाज होणे. वातप्रकृतीचे लक्षण.

**–ग्राहिता**–स्त्री., **लक्षण० अतिशीततया दन्तान् कार्याक्षमान् करोति** ( सुसू. ४५.११ )

दात धरणे. शिवशिवणे. अति थंडीमुळे दात चावण्याचे काम करीनासे होतात.

**–चलन**–न., **लक्षण० दन्तमांसे दन्तोलूखले च दन्तस्य इतस्ततश्चलनम्, चलदन्तत्वम्** ( कासू. २०.५ )

दात हालणे. हिरड्या दाताची उखळी यात इकडे तिकडे हालणे.

**–चाल**–पु., **लक्षण० चलदन्तत्वम्, दन्तशैथिल्यम्** ( चसि. २.२२ ) ( कासू. २७.१९–२५ ) ( अहसू. २२.५ ) दात हालणे. दात ढिले असणे.

**–च्छद**–पु., **ओष्ठः** ( असंउ. २६. ) ओठ.

**–जन्मन्**–न., **दन्तोत्पत्तिः** ( कासू. २०.३ )

दात येणे. दातांची उत्पत्ति.

**चतुर्विधं दन्तजन्म–सामुद्गं, संवृतं, विवृतं, दन्तसंपदिति** ( कासू. २०.७ ) **द्र० 'दन्त'**

येणारे दात ४ प्रकारचे; पोकळ, झांकलेले, पुढे आलेले. संपूर्ण गुणयुक्त.

**–जन्म–संवृतं–वेष्टितदन्तजन्म** ( कासू. २०.७ )

हिरड्यांनी झाकलेला दात येणे.

**–जन्म–सामुद्गं–संपुटयुक्तदन्तोद्भवः** (कासू. २०.७)

एकाच दाताचे दोन भाग झाल्यामुळे त्या दोन भागाचा संपुष्ट दिसतो. पोकळच बाहेर येणे.

**–जन्म–विवृतं–ओष्ठेनानाच्छादितं दन्तजन्म**

उघडा–पुढे आलेला दात येणे.

**–जन्मिकाध्याय**–पु., **( परिव० ) अध्याय०** ( कासू. २०.१ )

अध्यायाचे नाव. यात दात येण्याची माहिती आहे.

**–दुर्बलता**–स्त्री., **लक्षण० दन्तस्य कार्ये दौर्बल्यम्** ( कासू. २०.५ )

दातांचा दुबळेपणा–दातांची अशक्तता.

**–दृढता**–स्त्री., **लक्षण० दन्तस्य कार्ये दृढत्वम्** ( कासू. २०.५ ) दातांचा बळकटपणा.

**–दौर्बल्य**–न., **लक्षण० दन्तानां दुर्बलता** ( चसू. ५.२८ ) दातांचा दुबळेपणा–अशक्तता.

**–धावन**–पु., **वनस्पति० गुच्छकरञ्जः** ( रा. ९.१८४ ) वावळा.

**खदिरः** ( ध. १.२५ ) खैर.

न., **दन्तमार्जनम्, धावनं शुद्धिरिति यावत् दन्तरोगी तद्विवर्जयेत्** ( सुचि. २२.४२ )

दात घासणे, धुणे, दंतरोग्यांना वर्ज्य.

**–धावनकूर्चक**–न., **दन्तधावनानां करञ्जकादीनां कुटिलाग्रम्** ( सुसू. २७.१९ )

दात घासण्याकरिता करंज इत्यादिकांच्या काडीचा कुंचला.

**–नाडी**–स्त्री., दन्तरोग० **दन्तमूलजो व्याधिः अयं पंचधा–वातपित्तकफसन्निपातागन्तुभेदात्** ( असंउ. २५ ) ( सुचि. १६.२६ )
दाताच्या मुळाशी नाडीव्रण होणे. प्रकार–वात पित्त कफ संनिपात व आगन्तु.

**–निवृत्ति**–स्त्री., **दन्तपतनादनन्तरं तस्यापुनर्भवः** ( कासू. २०.५ )
दात पडल्यानंतर तो पुन्हा न येणे. दाताची निवृत्ति.

**–निषेचन**–न., ( परिव० ) **दन्तसंभवः** ( कासू. २०.४ ) दात वर येणे. दात येणे.

**–निष्पीडित**–वि., **दन्तैः पीडितम्** (सुसू. ४५.१५७)
दातांनी चावलेले, चावा घेतलेले.

**–पतन**–न., **दन्तस्य पतनम्** ( कासू. २०.५ )
दात पडणे.

**–परिक्षय**–पु., **दन्तस्य क्षयः क्षीणत्वम्** ( कासू. २०.५ ) दात क्षीण होणे–झिजणे.

**–पवन**–न., **दन्तधावनकाष्ठम्, पूयते शुध्यते अनेनेति पवनं दन्तधावनकाष्ठे रूढम्**( चचि. २३.११६ )
दात धुण्याचे काष्ठ–घासण्याची काडी.

**–पवननिषेध**–परिव० पु., **दन्तपवनार्थमयोग्याः** ( सुचि. २४.४–१२ )
**गलरोगे, तालुरोगे, ओष्ठरोगे, जिह्वारोगे, आस्यपाके, श्वासे, कासे, हिक्कायां, छर्दिरोगे, दुर्बलत्वे, अजीर्णभक्ते, मूर्च्छायां, मदपीडिते, अर्दिते, शिरोरोगे, तृषायां, श्रमे, पानक्लमे, कर्णशूले, दन्तरोगे च दन्तपवनं निषिद्धमुक्तम्** ( सुचि. २४.४–१२ )
गळा टाळु ओठ जीभ डोके दांत यांचे रोग असताना तोंड येणे, श्वास, खोकला, उचकी, ओकारी, अजीर्ण, तहान, कानातील शूळ, थकवा, अशक्तता, मद्यपानाचा थकवा, तोंड वांकडे होणे, मद्याचा माज असतांना काडीने दात घासणे निषिद्ध आहे.

**–पातन**–वि., **चलतां दन्तानां पातकरम्** ( शरपुङ्खमुखयन्त्रम् ) ( अहसू. २५.३३ )
दात पाडणारे यंत्र. शरपुंखमुखयंत्र.

**–पुप्पुट**–पु., दन्तरोग० **दन्तमूलगतोऽयं व्याधिः, द्वयोस्त्रिषु वा दन्तमूलेषु कफास्राद्बदरास्थिनिभो घनस्तीव्ररुक् च शोफो भवति । स च शीघ्रं पच्यते । स दन्तपुप्पुटो नाम दन्तरोगः** ( असंउ. २५ ) **तस्य चिकित्सा–अस्मिन् व्याधावुत्पन्ने सति रक्तावसेचनं प्रथमं करणीयम् । अनन्तरं पञ्चलवणैः सह क्षारो मधुना सह प्रतिसारणार्थं योजनीयः । तथा शिरोविरेको मधुकोत्पलपद्मकैः सह त्रिफलासिद्धस्नेहेन नस्यं करणीयम् । स्निग्धं चापि भोक्तव्यम्** ( सुचि. २२.१२–१३ )
दाताच्या मुळाशी होणारा विकार. दोन किंवा तीन दातांच्या मुळांशी कफ व रक्त दुष्टीने बोराच्या आठळीसारखी घट्ट व तीव्र वेदना असलेली सूज येते व ती त्वरेने पिकते. हा दंतपुप्पुट विकार होय.
**उपचार**–ही सूज दिसताच जळवांनी रक्त काढावे नंतर पाचही मिठे व जवखार मधात कालवून चोळावे. नाकात नस्य देऊन स्राव, शिंकानी डोळे शुद्ध करून, मध निळे कमळ पद्मकाष्ठ व त्रिफला यांनी बनवलेल्या तेलाचे नस्य करावे, स्निग्ध भोजन करावे.

**–पुप्पुटक**–पु., दन्तमूलगतरोग० **दन्तमांसस्य शोफप्रधानो रोगः दन्तपुप्पुटः** ( सुनि. १६.१६ )
द्र० 'दंतपुप्पुट'.

**–फला**–स्त्री., वनस्पति० **पिप्पली** ( रा. ६.११० )
पिंपळी.

**–बीजक**–पु., वनस्पति० **दाडिमः** ( रा. ११.९३ )
डाळिंब.

**–बीजा**–स्त्री., वनस्पति० **क्षीरतुम्बी** ( रा. ७.२३९ )
दुधी. दुध्या भोपळा.

**–भाण्ड**–न., **दन्तनिर्मितं पात्रम्** ( रा.१२.४३.४४ )
हस्तिदंताचे भांडे.

**–भेद**–पु., दन्तरोग० **दन्तस्य भेदः** ( चसू. २०.११ ) ( असंउ. २५ असंसू. २० )
दातास चीर पडणे, तुकडा पडणे.

**–मांस**–न., **दन्ताधारमांसम्** ( चचि. १२.७८ ) ( अहसू. २.३ )
दात ज्या मांसात रुपलेले ( बसलेले ) असतात ते मांस; हिरडी.

**–मूल**–न., **दन्तोत्पत्तिस्थानम्** ( सुनि. १६.१८ ) ( असंशा. ८.३२ )
दातांचे मूळ, दातांच्या उत्पत्तीचे स्थान.

**–मूलगतरोग**–पु., **दन्तमूलास्थ्याश्रयिरोगः शीतादो दन्तपुप्पुटकः, दन्तवेष्टकः, शौषिरो, महाशौषिरः, परिदरः, उपकुशो, दन्तवैदर्भो, वर्धनोऽधिमांसो नाड्यः पञ्चेति** ( सुनि. १६.१३ )

दाताच्या मुळाशी गेलेला, झाला रोग त्यांची नावे वर आहेत.

**–लेखन**–न., शस्त्र० (असंसू. ३४.२४)
दात खरडण्याचे यंत्र.

**–लेखनक**–न., शस्त्र० (अहृसू. २६.१९)
दात खरडण्याचे यंत्र.

**–वल्क**–न., दन्तत्वक् (सुनि. १६.३३)
दाताचे कवच, दाताची त्वचा.

**–विद्रधि**–पु., दन्तरोग० दन्तमूलगतोऽयं व्याधिः। **सरक्तैर्वातादिभिर्दोषैर्दन्तमांसेऽन्तर्बहिश्च गुरुः सरुग्दाहश्वयथुश्च भवति, स च भिन्नः पूयास्रं स्रवेत् स रोगो दन्तविद्रधिः** (असंसू. २५) (चचि. १२.७८)
दाताच्या मुळाशी हा रोग होतो. रक्त व वातादि दोष दाताच्या मांसात आंतून बाहेरून जाड, वेदना दाहयुक्त सूज उत्पन्न करतात. ती पिकून फुटली की पू व रक्त यांचा स्राव होतो. हाच दाताचा विद्रधि; गळू.

**–वृद्धि**–स्त्री., **परिव० दन्तस्य वर्धनम्** (कासू. २०.५) दातांची वाढ.

**–वेष्ट**–पु., दंतरोग० **दुष्टशोणितजोऽयं व्याधिः, अस्मिन् चलाः दंताः पूयरुधिरं स्रवन्ति (मा)** (सुसू. २३.८)
रक्त दुष्ट झाल्याने हा होतो. यात दात हालतात. पू रक्त यांचा स्राव होतो.

**–वेष्टक**–पु., **दन्तानां वेष्टकः** (चशा. ७.११)
दातांचे वेष्टन; हिरडी.

**–वैदर्भ**– पु., दन्तरोग० (सुसू. २५.९) **लक्षणम्– घृष्टेषु दन्तमूलेषु महान् संरम्भो जायते, दन्ताश्चला भवन्ति च। स अभिघातजो वैदर्भो नाम व्याधिः** (सुनि. १६.२३–२४) **शस्त्रेण दन्तमूलशोधनम्। क्षारस्योपयोगः कर्तव्यः। सर्वोऽपि चिकित्सा शीतगुणप्रधाना करणीया** (सुचि. २२.२२)
दाताच्या मुळात घर्षणाने मोठी सूज येते, दात हालतात. हा आघाताने होतो. **उपचार**–शस्त्राने दातांच्या मुळांतले दोष काढणे. क्षाराचा उपयोग करावा. सर्व उपचार थंड करावे.

**–शङ्कु**–पु., शस्त्र० **कपालिकाशर्करादिदन्तदोषहरणाय शङ्कुः** (सुसू. ८.३–४)
दातावर असलेली खर, कपऱ्या इत्यादी खरडून काढण्यासाठी उपयुक्त शस्त्र.

**–शठ**–पु., वनस्पति० **जम्बीरः** (ध. ५.१४) ईडनिंबू. **वृक्षाम्लः** (चचि. ३.२६७) (सुसू. ४६.१९१) (र. १८.२२६) अमसूल.
**कपित्थः** (रा. ११.१५५) कवठ.

–(**शठा**)–स्त्री., **वनस्पति० क्षुद्राम्लिका** (ध. ५.३६) अंबोती.

**–शर्करा**–स्त्री., दन्तरोग० **लक्षणम्–दन्तेषु शर्करेव स्थिरीभूतो मलो दन्तशर्कराख्यो रोगः। सेयं दन्तशर्करा दन्तानां शुक्लादिगुणहारिणी** (सुनि. १६.३२) **शर्करामुद्धरेत्, परं दन्तमांसानि मा हिंस्यात्। अनन्तरं मधुना सह लाक्षाचूर्णेनाऽवशिष्टशर्करां प्रतिसारयेत्** (सुचि. २२.३६–३७)
दातावर वाळूच्या कणासारखा पदार्थ (मळ) हळू हळू साठतो, ही दंतशर्करा. दातांचा पांढरेपणा इत्यादी गुण नाहीसे करते. हा मळ हळुवार खरडून काढावा; हिरडीला धक्का लावू नये; नंतर शिल्लक असलेल्या मळाकरिता लाखेचे चूर्ण मधाबरोबर चोळावे.

**–शुद्धि**–स्त्री., **दंतधावनम्, तस्य विधिः–दन्तशोधनद्रव्येण मृदुना कूर्चेन दन्तमांसाबाधनेनैकैकं दशनं घर्षयेत्** (सुचि. २४.८–९)
दाताची शुद्धि, दात धुणे. दात स्वच्छ करणाऱ्या द्रव्याने मऊ कुंचलीने हिरड्यांना धक्का न लावता एकेक दात घासावा.

**–शूल**–पु., लक्षण० **दन्तस्य शूलः** (चसि. २.१६)
दाताचा शूल. वेदना.

**–शैथिल्य**–न., लक्षण० **दन्तस्य शैथिल्यम्** (चसू. २०.११) (असंसू. २९.१३)
दातांची शिथिलता. दात ढिले होणे.

**–शोधन**–न., **दन्तशुद्धिः** (सुचि. २४.८–९)
दात शुद्ध करणे, धुणे.

(**–शोधनी**)–स्त्री., वनस्पति० **जीरकभेदः कृष्णजीरकः** (रा. ६.१०५) द्र० **'जीरक'**
दात शुद्ध करणारे, काळे जिरे.

**–शोष**–पु., लक्षण० **दन्तस्य शोषः** (चसि. २.१६)
दाताचा शोष.

**–स्तम्भ**–पु., लक्षण० **दन्तस्य स्तम्भः** (चसि. २.१६)
दातखीळ बसणे.

**–स्थिति**–स्त्री., **दन्तस्य स्थिरत्वम्** (कासू. २०.५)
दात स्थिर असणे, बळकट असणे.

**-संपद्**–स्त्री., **सर्वगुणसंपन्नता, अष्टमे मासि निषिक्ता नाम उद्भूता दन्ताः सर्वगुणसंपन्ना भवन्ति** ( कासू. २०.८ ) द्र० ' दन्त '
दाताचे सर्व गुण परिपूर्ण असणे. आठव्या महिन्यात निघालेले दात सर्वगुणसंपन्न असतात.

**-हर्ष**-पु., **दन्तरोग० दन्तस्य हर्षः** ( चचि. २.२२ ) ( सुनि. १६.३० ) **लक्षणम्–यस्य दशनाः शीतमुष्णं च स्पर्शनं न सहन्ते । सोऽयं समीरणाद्भवति** ( सुनि. १६.३० ) ( असंउ. २५ )
**सुखोष्णाः स्नेहा वातव्याधिपठितत्रिवृत्सर्पिः वातघ्नकषायाश्च कवलार्थमुपयोजनीयाः । स्नैहिक-धूमस्य, स्नैहिक-नस्यस्य, स्नैहिक-भोजनस्याप्युपयोगः करणीयः** ( सुचि. २२.३४–३६ )
रोग–दात आंबणे, शिवशिवणे. दात थंड किंवा उष्ण स्पर्श सहन करीत नाहीत. वाताने हा होतो. **उपचार**–थोडे गरम औषधि तेल तूप वातव्याधि उपचारात सांगितलेले त्रिवृत्तूप वातघ्न काढे यांच्या गुळण्या. स्नेहयुक्त धूम्रपान, नाकात स्नेहनस्य व तसेच भोजनही उपयुक्त.

**-हर्षण**–पु., **वनस्पति० जम्बीरः** ( ध. ५.१४ )
ईडनिंबु. दातात शिरशिरी उत्पन्न करणारा.

**-हर्षप्रमर्दन**–वि., **दन्तहर्षनाशकः** ( सुचि. २२.३४ )
दातातील शिरशिरी नाशक.

**दन्ताद्**–पु., **शोणितजकृमि० दन्तान्दन्तमांसानि चात्तीति दन्तादः । अदृश्योऽयं कृमिः । दुश्चिकित्स्यो नत्वसाध्यः ।** ( सुउ. ५४.१५ ) **दन्तादचिकित्सा– अचलं कृमिदन्तं स्वेदयेत् । ततो रक्तमोक्षणं च विधेयम् । तथा च वातहरद्रव्यैरवपीडनं नाम नस्यमुपयोज्यम् । वातघ्नसिद्धतैलैर्गण्डूषाः करणीयाः । तत्स्थाने भद्रदार्वादिभिश्च लेपः स्निग्धं भोजनं चोपयोज्यम् । चलं कृमिदन्तमुत्पाट्य दन्तसुषिरमग्नितप्तशलाकादिभिश्च दहेत् । विदारी-यष्ट्याह्वादिसिद्धं तैलं नस्यार्थमुपयोज्यम्** ( सुउ. ५४.३७ )
रक्तज कृमि. दांत व हिरड्या खाणारा हा कृमि अदृश्य आहे. उपचारांनी फार कष्टाने साध्य. असाध्य मात्र नाही. **उपचार**–रक्तस्राव करावा, वातहर द्रव्यानी अवपीडक नावाचे नस्य–( नाकात औषध ) घालावे, वातनाशक तेलाने गुळण्या कराव्या, त्याठिकाणी देवदार इत्यादी औषधांचा लेप करावा, स्निग्ध भोजन असावे हालता किडलेला दांत उपटावा व ती पोकळी अग्नीने तापविलेल्या सळईने जाळावी. भुइकोहळा ज्येष्ठमध इत्यादीनी बनवलेले तेल नाकात घालावे.

**दन्ताधान**–पु., **वनस्पति० निम्बूकः** ( रा. ११.२२ )
निंबू दातांवर आघात–अनिष्ट परिणाम करणारा.

**दन्तान्तर**–न., **दन्तयोर्मध्ये योऽवकाशः सः**
दातातील अंतर. जागा, अवकाश. ( सुसू. ४६.४८३ )

**दन्ताशय**-पु., **शारीर० दन्तस्थानम्** ( असंउ. २ )
दाताचे स्थान, जागा.

**दन्तिनी**–स्त्री.,) **वनस्पति० दन्ती** ( रा. ६.३३८ )
दाती, दातीमूळ.

**-बीज**–न., **वनस्पति० जेपालः** ( रा. ६.३४४ ) ( ध. १.२२७ ) जयपाळ.

**दन्तिमद्**–पु., **वनस्पति० हस्तिमदः** ( रा. ६.२० )
हत्तीचा मद, माज.

**दन्ती**–स्त्री., **वनस्पति०** ( ध. १.२२३ ) **गुणाः–कटुका उष्णा तीक्ष्णा दीपनी शोधनी, कफवातघ्नी उदराशेव्रणाश्मरीशूलामदोषत्वग्दोषहरा च**
दाती. हिची काळी मुळे उपयोगी. **गुण**–तिखट, उष्ण, तीक्ष्ण, दीपक, मलशोधक, कफवातनाशक, उदर, मूळव्याध, व्रण, मूतखडा, शूल, आमदोष आणि त्वचा दोषनाशक.

**-शलाटु**–पु., **दन्तीफलम्** ( चचि. १६.५१ )
दांतीचे फळ.

**-स्नेह**–पु., **तैल० तद्गुणाः–तिक्तः कटुः कषायश्चाऽधोभागदोषहरः कृमिकफकुष्ठानिलहरो दुष्टव्रणशोधनश्च** ( सुसू. ४५.१२४ )
जयपाळाचे तेल. कडु, तिखट, तुरट, दुष्टव्रण शुद्ध करणारा, खालच्या भागातील दोष नाहीसे करणारा, कृमि कफ कुष्ठ वातहारक.

**-हरीतकी**–स्त्री., **योग० दन्तीचित्रकहरीतक्यादिसाधितोऽयं गुल्मार्शःश्वयथुकुष्ठकामलारोचकग्रहण्यादिहरः** ( असंचि. १६ )
दांती चित्रक हिरडा इत्यादी युक्त योग. गुल्म मूळव्याध सूज कुष्ठ कावीळ रुचिनाश ग्रहणी इत्यादी हारक.

**दन्तुरत्वच्**–पु., **वनस्पति० मातुलुङ्गः** ( रा. ११.२७ )
महाळुंग,

**दन्तोलूखल**–न., **शारीर० दन्तानामुलूखलम्** (चशा.७.६) दातांची उखळी. उखळ, ज्या पोकळीत दात बसले आहेत ती.

**दन्त्यरिष्ट**–पु , **आसुत० दन्तीचित्रकपंचमूलादिसिद्धोऽयं ग्रहणीपांडुरोचकघ्नो दीपनः शुष्कार्शोघ्नश्च** (चचि. १४.१४४–४७ सुचि. ६.१४) दन्ती चित्रक मोठे पंचमूळ इत्यादीयुक्त बनविलेले अरिष्ट. सुकी मूळव्याधनाशक.

**दन्त्यादिगण**–पु., **द्रव्य० गण० दन्तीत्रिवृच्चित्रकपलाशमूलत्रिकटुत्रिफलाऽष्टवर्गविडंगपलाशबीजमुस्तकजीरकैलाकण्टकारीणां समूहः लोहकल्पार्थमुपयुज्यते** (र. २८.६२) दन्ती इत्यादिकांचा गण. दांती तेड चित्रक पळसमूळ सुंठ मिरे पिंपळी त्रिफळा अष्टवर्ग वावडिंग पळसाचे बी नागरमोथा जिरे वेलदोडा रिंगणी लोखंडाचा कल्प करण्याकरिता उपयुक्त.

**दन्दशूक**–वि., **पुनः पुनर्भक्षणशीलः, दष्टुं शीलं अस्य इति** (चक्र चचि. ८.९७) पुनः पुन्हा खाण्याची सवय असलेला. दंश करण्याचा स्वभाव असणारा.

**दम**–पु., **वनस्पति० दमनम्** (ध. ३.६६) दवणा.

–**वशान्वित**–पु., **वनस्पति० दमः** (ध.३.६६) दवणा.

**दमन**–पु., **वनस्पति० कुन्दः** (रा. १०.२५६) कुंदाचे फूल, कुंद.

न., **वनस्पति० तद्गुणाः– तिक्तः कषायः कटुकः शीतलो हृद्यस्त्रिदोषघ्नो विषभूतकण्डूकुष्ठविस्फोटहरश्च** (ध. ३.६४)

**गुण**–कडु तुरट तिखट थंड त्रिदोषनाशक हृदयाला हितकर. विष भूतबाधा खाज कुष्ठ विस्फोट (फोड) नाशक.

(**दमनी**)–स्त्री., **वनस्पति० अग्निदमनी** (रापरि. ४.४) लहान रिंगणी, धमासा.

**दमनक**–पु., **वनस्पति० दमनम्** (रा. १०.१९) दवणा.

**दमयन्ती**–स्त्री., **वनस्पति० मल्लिका** (रा. १०.२२५) मोगरी. मोगरीचे फूल.

**दम्पती**–पु., **जायापती** (सुचि. २४.९२.) पतिपत्नी. नवरा बायको.

**दम्भ**–पु., **कुहकवृत्तिता** (ड.) **राजसगुणः** (सुशा. १.१८) ढोंग. कपट. रजोगुण.

**दर**–पु., **लक्षण० दरदरिका, हृत्कम्पः** (चसू. १७.३१) हृदयात कंप, धडधड. दरदर.

–**द**–पु., न., **खनिज० हिङ्गुलः** (र. १.१८८) (ध. ६.४०) हिंगूळ.

**दरण**–न., (**परिव०**) **वेदना० आरया दीर्यते इव** (सुउ. ४३.६) आरीने कापल्यासारखी वेदना.

**दरिद्र**–पु., **निर्धनः** (सुचि. ३०.४) निर्धन, दरिद्री, गरीब.

**दर्दुर**–पु., **खनिज० खर्परप्रकारः** (र. २.१५२) कलखापरीचा प्रकार.

**प्राणि० मण्डूकः** (इन्दु. असंउ. ४३) बेडूक.

**शालिधान्य०** (चसू. २७.१४) साळ, तांदूळ.

(**दर्दुरी**)–स्त्री., **वनस्पति० मण्डूकपर्णी** (र. १२.८८) मंजिष्ठा, ब्राह्मी.

**दर्प**–पु., **भैषज्य० कस्तूरिका** (अहृसू. ३.११) कस्तुरी.

**दर्पण**–पु., **आदर्शः** (चचि. ९.१८) (सुउ. ६०.१९) आरसा.

**दर्भ**–पु., **वनस्पति० सः खरमृदुभेदेन द्विधा; गुणाः– मधुरः, शीतलो रुच्यः पित्तघ्नो मूत्रकृच्छ्ररक्तपित्तज्वरतृषाश्वासकामलाघ्नः** (ध. ४.१३३) **तृणपंचमूलेष्वेकम्** (अहृसू. १५.२१) **स्तन्यजननगणे एकं द्रव्यम्** (चसू. ४.१२) (सुसू. ३८.७५–७६)

हिं.—दाभ.

**म.—दर्भ.**

गु.—कुश.

बं.—कुश.

दर्भ प्रकार २. खरखरीत व मऊ. **गुण**–गोड थंड रुचि उत्पन्न करणारा पित्तनाशक कष्टाने लघवी होणे रक्तस्राव पित्तज्वर तहान श्वास व कावीळ नाशक.

–**कुसुम**–पु., **कफजकृमि०** (असंनि. १४.५२) **द्र० 'कृमि'** एक कफज कृमि.

–**पञ्चक**–न., **तृणपञ्चमूलम्** (असंचि. ८) (हे. अहृसू. ६.१७१) गवती पाच मुळांचा गट.

–**पत्र**–पु., **वनस्पति० काशः** (रा. ८.२०१) कास गवत.

–**पुष्प**–पु., **श्लेष्मजक्रिमि०** (चवि., ७.१२. सुउ. ५४.१२) **द्र० 'कृमि'** एक कफज कृमि.

**सर्प० दर्वीकरः** (सुक. ४.३४ (१) नाग.

पु., **सर्प० राजिमान्** (सुक. ४.३४ (३) रेषा असलेला पट्टे असलेला साप.

–**मूल**–न., **दर्भस्य मूलम्** (अहृसू. ६.१७१) दर्भाचे मूळ.

–**संस्तरशायिनी**–वि., **यस्याः शयनं दर्भासने अस्ति सा** (सुशा. २.२५) जिचे निजणे दर्भाच्या आसनावर चटईवर असते अशी,

**दर्भाह्वय**-पु., वनस्पति० मुञ्जः ( रा. ८.२०४ )
मुंजा, मोळ, मुंज गवत.

**दर्विका**-स्त्री., चमसः ( र. ३.३४ )
पळी. चमचा. लहान पळी.

**दर्वी**-स्त्री., वनस्पति० दारुहरिद्रा ( ध. १.५८ )
दारुहळद.

**दर्व्याकारः शलाकायन्त्र०**
( सुचि. ६.८ असंसू. ३४ असंउ. ३५ )
सळई यंत्र. पळीसारखे टोक असलेले. ( कान कोरणे )

**-कर**-पु., सर्प० वातदोषकरमस्य विषम्
( चचि २३.१२४ )
**तद्गुणाः-मधुरः, कटुपाकी, अतिचक्षुष्यः, सृष्ट-विण्मूत्रमारुतश्च** ( सुसू. ४६.८४ )
नाग. याचे विष वातदोष कारक. **गुण**-गोड पचल्या-वर तिखट डोळ्याला अतिशय हितकर मळ मूत्र वात यांना मोकळेपणाने बाहेर घालवणारे.
**दर्वीकराः फणावन्तः दिवा चरन्ति; तरुणा दर्वीकरा मृत्युहेतवः** ( सुक. ४.३१-३२ )
फणा असलेले-नाग. हे दिवसा संचार करितात. तरुण नाग मारक असतात.
**दर्वीकराः-कृष्णसर्पो, महाकृष्णः, कृष्णोदरः, श्वेत-कपोतो, महाकपोतो, बलाहको, महासर्पः शङ्ख-कपालो, लोहिताक्षो, गवेधुकः, परिसर्पः, गण्ड-फणः, ककुदः, पद्मो, महापद्मो, दर्भपुष्पो, दधि-मुखः, पुण्डरीको, भ्रूकुटीमुखो, विष्किरः, पुष्पाभि-कीर्णो, गिरिसर्पः, ऋजुसर्पः, श्वेतोदरो, महाशिरा, अलगर्दः, आशीविषः इति** ( सुक. ४.३४ (१) )
नागांचे प्रकार २७ वर आहेत.

**-करदंश**-पु., **एतद्दंशः सूक्ष्मदंष्ट्रापदः, कृष्णो, निरुद्ध-रक्तः, कूर्माभो, वातव्याधिकरः** (चचि. २३.१२७)
नागाचा दंश. दंशाच्या खुणा सूक्ष्म काळ्या रक्त साकळलेल्या कासवाच्या पाठीसारख्या सुजलेल्या व वातरोगकारक.

**-करविष**-न., **तल्लक्षणम्-दर्वीकरविषेण त्वङ्नयन-नखदशनवदनमूत्रपुरीषदंशकृष्णत्वं रौक्ष्यं शिरसो गौरवं सन्धिवेदना कटीपृष्ठग्रीवादौर्बल्यं जृम्भणं वेपथुः स्वरावसादो घुर्घुरको जडता शुष्कोद्गारः कासश्वासौ हिक्का वायोरूर्ध्वगमनं शूलोद्वेष्टनं तृष्णा लालास्रावः फेनागमनं स्रोतोवरोधस्तास्ताश्च वातवेदना भवन्ति** ( सुक. ४.३७ )
नागाच्या विषाने-त्वचा डोळे नखे दात तोंड लघ्वी मळ व दंशाची जागा काळी रुक्ष डोके जड सांध्यात वेदना कमर पाठ मान यात अशक्तता कंप घरघर स्वर बसणे ( घसा ) लाल गळणे फेस येणे तहान कोरड्या ढेकरा मळावरोध पोट जड शूळ वेट येणे वात वर वर चढणे निरनिराळ्या वाताच्या वेदना खोकला श्वास उचकी ही चिन्हे होतात.

**-प्रलेप**-पु., योग०-**पलाशनिर्दाहरसेन साधितोऽयं कुष्ठहरः** ( चसू. ३.१६ )
पळसाचे झाड वर जाळून खाली मुळाचा गळणारा रस घेऊन त्याने तयार केलेला लेप. हा कुष्ठहर आहे.

**-विलेपन**-न., **पाकक्रियायां पाकस्य सान्द्रीभवनमा-दर्वीलेपनं कर्तव्यम्-तथा सान्द्रत्वं दर्वीप्रलेपनेन ग्राह्यम्** ( चचि. २३.१०२ )
लेप किंवा पाक करावयाचा तो पळीला चिकटण्या इतकाच घट्ट होईपर्यंत शिजवावा. म्हणजेच त्याचे सांद्रत्व हे पळीचा लपेटण्याने समजावे.

**दर्व्याकृति**-स्त्री., दर्वी; **दारुहस्तकस्तदाकृतिः**
( सुसू. ७.१४ )
पळीच्या आकाराचे, लाकडाच्या पळीच्या आकाराचे.

**दर्शन**-न., **चक्षुः** ( चक्र. चचि. २३.१२० ) डोळा.
**पञ्चबुद्धीन्द्रियेष्वेकम्** ( चशा. ७.७ )
पांच बुद्धींद्रियातील एक.
**दृष्टिः** ( सुउ. १७.५२ ) दृष्टि, नजर.
**आलोकनम्** ( चनि. ७.६ ) पाहणे.
**व्याध्यादिपरीक्षाप्रकारः** ( अहृसू. १२.५५ )
रोगाची परीक्षा करण्याचा प्रकार. रोगाची दिसणारी चिन्हे पाहणे.

**दल**-पु., **पर्णम्** ( डसुचि. ४.१०७ ) पान. पाते.
**शिम्बीधान्यस्य निस्तुषस्य खण्डः** ( सुसू. ७.१४ )
शेंगाच्या टरफल काढलेल्या दाण्याचा अर्धाभाग; डाळ.
न., **वनस्पति० तमालपत्रम्** (ध. २.५२) तमालपत्र.

**-पुष्पा**-स्त्री., वनस्पति० **केतकी** ( रा. १०.२ )
केवडी, केवडा.

**दलाम्ल**-न., वनस्पति० **शाकम्, चुक्रम्** (रापरि. ७.६४)
चुका. चाकवत.

**दव**-पु., **दावानलः** ( सुउ. ४१.३० ) वणवा.
**दाहः तापो वा** ( असंसू. २० )
आग, भगभग, उकडणे.

**दवथु**–पु., लक्षण० चक्षुरादिष्वत्यर्थं तापः च
( चचि. २१.३० ) ( चसू. २६.४३(४)
( असंसू. २०.१६ )
डोळे इत्यादी अवयव तापणे, त्यांची आग.

**दवन**–न., लक्षण० संतापः ( सुउ. ४५.९ )
संताप, आग, भगभग–भडका.

**दशन्**–वि., सङ्ख्या० ( सुउ. २१.२९ ) दहा ( संख्या )

**दशन**–पु., दन्तः ( सुचि. २२.२९ )
प्रत्यङ्ग० ( सुसू. ३५.१२ ) दात. अंगाचा अवयव.
न., भक्षणम् ( सुनि. १५.३ ) खाणे.

**–च्छद**–पु., ओष्ठः (चइ. ११.२०) (असंउ. २५) ओठ.

**(दश)–प्राणायतनीय**–वि., अध्याय० दश प्राणायतनानि अधिकृत्य कृतोऽध्यायविशेषः ( चसू. २९.१ )
अध्यायाचे नाव. प्राणाची दहा स्थाने. यांची माहिती यात आहे.

**–भागावशेष**–वि., पाकेन दशमो भागोऽवशिष्टो यस्य स ( रसः ) ( चचि. १.४६ )
शिजवून दहावा भाग ज्याचा शिल्लक ठेवला आहे असा.

**–मूल**–न., लघुपञ्चमूलं बृहत्पञ्चमूलं च मिलित्वा ( ध. ७.२२–२३ ) गुणाः–हिक्काशिरोरुजाश्वास-संनिपातज्वरतन्द्रापार्श्वशूलहरम् ( ध. ७.२२–२३ )
( चसू. ३. १९–२० ) ( सुसू. ६६–७१ )
( असंसू. १५ ) ( अहसू. १५–३ )
दशमूळ, दहा मुळे. मोठी पाच व लहान पाच मुळे मिळून. **गुण**–उचकी डोकेदुखी खोकला श्वास सन्निपातज्वर तंद्रा फासळीतील वेदनानाशक.

**–(मूली)**–स्त्री., दशमूलानि ( चसू. २.२७ )
दशमूळ–दहा मुळे.

**–मूलहरीतकी**–स्त्री., योग० दशमूलत्रिकटुत्रिजात-यवक्षारादिसाधितोऽयं श्वयथूदरज्वरारोचकाविपाकपाण्डुरोगगुल्ममेहश्वासकासकार्श्यामवाताम्लपित्त-मलदोषशुक्रदोषहरा ( असंचि. १९.१०७ )
दशमूळ हिरडा–दशमुळे सुंठ मिरे पिंपळी इत्यादी-द्रव्यांनी तयार केलेला हिरडा. हा सूज उदर ज्वर रुचिनाश अपचन पांडु गुल्म प्रमेह श्वास खोकला कृशता संधिवात अम्लपित्त मूत्र व शुक्रदोष नाशक.

**–मूलीघृत**–न., सिद्धघृत० दशमूलव्योषक्षारलवणादि-सिद्धमिदं कफगुल्महरम् ( चचि. ५. १४२ )
दशमूळाने सिद्ध तूप. सुंठ इत्यादि द्रव्ये त्यात असतात. कफगुल्मनाशक.

**–सार**–न., योग० यष्टीद्राक्षाधात्रीचंदनैलवालकादि-साधितमिदं सर्वपित्तविकारमेहतृष्णादिहरम्
( र. १८-२४० )
द्राक्षे चंदन वेलदोडे वाळा इत्यादी सह बनविलेला एक योग. सर्व पित्तविकार प्रमेह तहान नाशक.

**दशा**–स्त्री., सदशस्य वस्त्रप्रान्तः ( सुसू. २९०.१० )
( असंशा. १२.४ )
दशा. कपड्याच्या दशा. शेवटचा भाग.

**दशाङ्ग**–पु., योग० मांसीत्वक्पत्रसुरसमनोह्वाशीत-कुंकुमनिशाव्याघ्रनखशुण्ठीसाधितोऽयं विषनाशनः
( असंउ. ४० )
दशांगलेप. योग. जटामांसी दालचिनी तमालपत्र मनशीळ वाळा केशर हळद वाघनख सुंठ यांचा बनाव. विषनाशक.
न., दशमूलम् ( सुउ. ५७.१४ ) दशमुळे. दशमूळ.

**दशाङ्गयोग**–पु. योग० कफजच्छर्द्यां शमनार्थं प्रदिष्टः योगविशेषः ( सुउ. ४९.२३ ) नागरं धान्यकं भार्गीमभयां सुरदारु वचां पर्पटकं मुस्तं भूतीकं कट्फलं च ग्राह्यम् ( सुउ. ३९.१९३ )
**दशांगयोग**–सुंठ धणे भारंगमूळ हिरडा देवदारु वेखंड पित्तपापडा नागरमोथा रोहिसगवत कायफळ यांचा योग कफज वांती नाशक.

**दशाङ्घ्री**–स्त्री., दशमूलम् ( र. १६ ७४ )
दशमुळे, दशमूळ.

**दशाष्टक्रिया**–स्त्री., अष्टादश पारदसंस्काराः ( र. ७.३७ )
पाऱ्याचे अठरा संस्कार.

**दष्ट**–न., व्याडादिभिर्दंशः ( ड. सुसू. ४२.१० )
डसलेला. सर्प इत्यादींनी केलेला दंश.

**–निपीडित**–न., सर्पदंशभेदः ( असंउ. ४१ )
सर्पाच्या दंशाचा प्रकार.

**दष्टक**–न., सर्पदंशभेदः, अयं सर्पदंशः असाध्यो वर्तते
( असंउ. ४१ )
सर्पाच्या दंशाचा प्रकार. हा असाध्य.

**दष्टौष्ठ**–वि., लक्षण० क्षत ओष्ठो यस्य सः
( सुशा. १०.५१ ) तुटक्या ओठाचा.

**दस्र**–पु., वैद्यविशेषौ, अश्विनौ ( र. २७.१४३ )
विशिष्ट वैद्य. दोघे अश्विनीकुमार.

**दहन**–पु., वनस्पति० भल्लातकः ( ध. ३.४३ )
भिलावा, बिब्बा, अग्नि.

चित्रकः ( ध. २.८० ) चित्रक.

**आसुत० सूक्तम्** ( ध. ६.२४६ ) शिरका.

**महाभूतम्, अग्नेः रूपम्—एकगुणवृद्ध्यन्वयेन त्रिगुणत्वाच्छब्दस्पर्शरूपगुणत्वम्** ( सुसू. ४२ (४)३ ) अग्निमहाभूत. अग्नीचे रूप. क्रमाने एक गुण वृद्धि या दृष्टीने अग्नि हा त्रिगुणी—शब्दस्पर्शरूपगुणवान्.

न., **उपक्रम० दाहः, क्षारादिना औषधकर्म** ( सुसू. ४०.५ ) ( अहसू. १५.१ ) एक उपचार. डाग. क्षार अग्नि इत्यादींनी जाळणे—डागणे.

**(दहनी)**—स्त्री., **वनस्पति० मूर्वा** (रा. ३.१०) मोरवेल.

**—विशेष**—पु., **दाहप्रकारभेदः** ( सुसू. १२.११ ) डागण्याचे प्रकार, भेद.

**दहनागरु**—न., **वनस्पति० दाहागरु** ( रा. १२.४३ ) द्र० 'अगरु'. दाह करणारा अगरू.

**दहनाराति**—पु., **जलम्** ( रा. १४.३१८ ) पाणी, जल, अग्नीचा शत्रु.

**दाक्षिणात्यक**—पु., **वनस्पति० नारिकेलः** ( ध. ५.७४ ) नारळ.

**दाक्षिण्य**—न., **परापेक्षिणी प्रकृतिः, परच्छन्दानुवर्तिता** ( सुसू. ४५.२०७ ) दुसऱ्याच्या सोयीने वागण्याची प्रकृति.

**दाडिम**—पु, न., **वनस्पति० फलविशेषः** ( चसू. २७.१४९–५० ) **महाकषायवर्गे हृद्यगणे छर्दिनिग्रहणगणे श्रमहरगणे चैकं द्रव्यम्** ( चसू. ४.१०, १४,१६ ) **तद्विविधम्, अम्लं मधुरं च; साधारणगुणाः—अम्लं कषायं मधुरमुष्णम् ( च ) शीतलम्** ( रा. ११.९५–९६ ) **स्निग्धम्** ( रा. ) **लघु** (भाप्र.) **ग्राहि, दीपनं, हृद्यम्** ( रा. ) **रुच्यं, तर्पणं, शुक्रलं, मेधाबलावहं, वातघ्नं, कफपित्ताविरोधि, त्रिदोषघ्नम्** ( भाप्र. ) **कासघ्नम्** ( रा. ) **हृत्कण्ठमुखगन्धघ्नं, तृड्दाहज्वरनाशनम्** ( भाप्र. ) **तत्र मधुरं दाडिमं पित्तघ्नं प्रशस्तं च । रूक्षाम्लं दाडिमं पित्तानिलकोपनम् ( च ) अम्लं दाडिममुष्णं वातकफापहम्** ( सुसू. ४६.१४१–४२ ) **स्वाद्वम्लं दाडिमं किञ्चित् पित्तकरं लघु** ( भाप्र. ) **दाडिमपुष्परसो घ्राणगे रक्तपित्ते उपयुज्यते** ( असंचि. ३ )

हिं.—अनार.

**म.—डाळिंब.**

गु.—दाडम.

बं.—डालिम.

ता.—मातुळै.

डाळिंब फळ. हे हृदयाला हितकर. **गुण**—ओकारी थांबविणारा व श्रम हरण करणाऱ्या गणात आहे. प्रकार दोन. गोड व आंबट; **साधारण गुण**—गोड आंबट तुरट थंड स्निग्ध हलके त्रिदोषघ्न अग्निदीपक रुचकर मळ बांधणारे हृदयाला शुक्राला हितकर तृप्तिकारक पौष्टिक धारणाशक्ति व बलवर्धक खोकला तहान आम ज्वर हृदय घसा तोंड वांती दुर्गंधनाशक. **गोड डाळिंब**—पित्तघ्न. **आंबट डाळिंब**—उष्ण, वातकफनाशक, वातपित्तवर्धक. **आंबट गोड डाळिंब**—किंचित् पित्तकर, हलके, डाळिंबाच्या फुलाचा रस नाकातून होणाऱ्या रक्तस्रावात उपयुक्त.

**—पुष्पक**—पु., **वनस्पति० रोहितकः** ( ध. ५.१३० ) रक्तरोहडा.

**—यूष**—पु., **दाडिमसंस्कृतयूषः** ( का खिल. ४.३६ ) डाळिंब घातलेले कढण.

**—वेत्रासव**—पु., **आसुत०** ( सुसू. ४६.४३२ ) आसव. डाळिंब व वेताची पाने यांचे आसव.

**दाडिमादिरसक्रिया**—स्त्री., **रसक्रिया० दाडिमाद्यवलेहः** ( सुउ. १२.४२ ) डाळिंब इत्यादी द्रव्यांचा अवलेह, लेह.

**दाडिमाद्यघृत**—न., **घृत० पाण्डुरोगे उपयुक्तम्** ( चचि. १६.४४–४६ ) पांडुरोगात उपयुक्त तूप.

**दाडिमाष्टक**—पु, **योग० चातुर्जातयवान्यादियुक्तः, अतिसारे समुपयोज्यः** ( असंचि. ११. ) डाळिंब, चातुर्जात, ओवा, इत्यादी आठ औषधांचे चूर्ण अतिसारावर द्यावे.

**दाडिमीसार**—पु., **वनस्पति० दाडिमः** ( ध. २.६१ ) डाळिंब.

**दात्यूह**—पु., **पक्षि० प्रतुदजातीयोऽसौ, कालकण्टकः** ( सुसू. ४६.६७ ) पाणकावळा.

**दाधिकघृत**—न., **घृत० गुल्मप्लीहाशूलनाशनम्** ( सुउ. ४२.२९–३० ) वनस्पती व तुपाच्या चौपट दही घालून केलेले तूप. गुल्म प्लीहा व शूल नाशक.

**दाधिकाख्यसर्पिस्**—न., **घृत० दाधिकघृतम्** ( असंचि. १६ ) **द्र० दाधिक घृत.**

**दान**—न., **वनस्पति० हस्तिमदः** ( रा. परि. ६.२० ) हत्तीच्या गंडस्थळातील स्राव. हत्तीचा माज—मद.

**दानवप्रिया**—स्त्री., **वनस्पति० ताम्बूली** ( ध. परि. ३.२ ) विड्याच्या पानांची वेल, विड्याची पाने.

**दान्त**–वि., **शिक्षितः** ( चचि. ९.८२ )
शिकलेला. शिकविलेला.
पु., **वनस्पति० दमनम्** ( ध. ३.६४ ) दवणा.

**दाम**–न., **व्रणबन्ध० संबाधेऽङ्गे विधेयः**
( सुसू. १८.१७–१८ )
व्रणाला बांधावयाचा पट्टा.
**ग्रैवेयकादिपुष्पाभरणम्** ( सुसू. १९.२५ )
फुलांची माळ.

**दारक**–पु., **पुत्रः** ( काकरेवर्ती ) पुत्र, मुलगा.

**दारण**–न., **उपक्रम०** ( चसू. ११.५५ ) **विदारणम्** ( सुचि. १५.३ ) **पाटनम्** ( सुचि. ४.९ ) **शरकर्णादिशल्यस्य द्विधाकरणम्** ( सुसू. ७.१७ ) फोडणे, फाडणे; शल्याचे दोन–अनेक भाग करणे.

**दारणक**–न., **रोग० कपालगतरोगः, कफवाताभ्यां हेतुभ्यां कण्डूकेशच्युतिस्वापरौक्ष्यकृद्यत् सुसूक्ष्मं त्वचः स्फुटनं, तद् दारणकमिति विद्यात्**
( असंउ. २७ )
रोग–दारणा. डोक्याच्या कवटीचा रोग. कफ-वातांनी होतो. **लक्षणे**–खाज केस गळणे स्पर्श-नाश रूक्षता व कातडीचे पापुद्रे निघणे.

**दारवी**–वि., **काष्ठमयी, दारुणा निर्मिता दारुमयी वा इति दारवी** ( सुचि. २०.४३ ) लाकडाची केलेली.

**दारी**–स्त्री., **रोग० विपादिका** ( सुनि. १३.२९ )
पाय फुटणे. रोग.

**दारु**–न., **वनस्पति० देवदारुः** ( ध. १.७६ ) देवदार.
**–कण्टक**–पु., **खनिज० पित्तलम्** (ध. ६.१९) पितळ.
**–कदली**–स्त्री., **वनस्पति० काष्ठकदली**
( रा. ४१.११० ) लाकडी केळ.
**–निशा**–स्त्री., **वनस्पति० दारुहरिद्रा** ( ध. १.५८ )
दारुहळद.
**–पत्रिका**–स्त्री., **वनस्पति० हिङ्गुपत्री** ( ध. २.३८ )
बाफळी.
**–पत्री**–स्त्री., **वनस्पति० हिङ्गुपत्री** ( रा. ६.६२ )
बाफळी.
**–पीता**–स्त्री., **वनस्पति० दारुहरिद्रा** ( रा. ६.८४ )
दारुहळद.
**–मत्स्याह्वा**–स्त्री., **प्राणि० गोधा** ( रा. १९.१७ )
घोरपड.
**–वाह**–पु., **राजर्षि० कश्यपशिष्यः** ( कासू. २५.३ )
एक राजर्षि. कश्यपाचा शिष्य.
**–विभावरी**–स्त्री., **वनस्पति० दारुहरिद्रा**
( रा. २२.७८ ) दारुहळद.
**–शल्य**–न., **काष्ठशल्यम्** ( अहृसू. २८.४४ )
लाकडाचे शल्य. लाकडाचा सल. ( कुसळ )
**–हरिद्रा**–स्त्री., **वनस्पति० महाकषायवर्गे लेखनीयगणे, कण्डूघ्नगणेऽर्शोघ्नगणे चैकं द्रव्यम्**
( चसू. ४.९–११ )
**तिक्ता, कटूष्णा, रूक्षा, व्रणमेहकर्णरुजामुखरुजाकर्णकण्डूनेत्रकण्डूविसर्पत्वग्दोषनाशिनी**
( ध. १.५७ रा. ६.८५–८६ )
**तस्यास्त्वक् त्रिदोषजेऽतिसारे उपयुज्यते**
( चचि. १९.८० )
**अस्याः सारः शीर्षविरेचने उपयुज्यते**
( चसू. २.५ )
हिं.—जर्की–हलद.
**म.—दारुहळद.**
बं.—दारहळदी.
ता.—कस्तुरिमंजल.
दारुहळद. दोष खरडून काढणाऱ्या वनस्पतींच्या कंडूनाशक मूळव्याधनाशक गणांमधील एक द्रव्य. **गुण**–कडु, तिखट, उष्ण, रूक्ष, व्रण, प्रमेह, कान दुखणे, खाज, डोळ्याची खाज, तोंडाचे रोग, धावरे, त्वचेचे विकारनाशक. हिची साल त्रिदोषज अतिसारात उपयुक्त. हिचा शिरा डोळ्याची सूज नाहीशी करतो, डोळ्याच्या दोषांचे शोधन करतो.

**दारुक**–न., **वनस्पति० देवदारुः** ( रा. १२.१०३ )
देवदार.

**दारुण**–वि., **तीक्ष्णः** ( चसू. १८.४१ ) **कठिनम्** ( सुचि. ७.३ ) कठीण, तीक्ष्ण.
**किञ्चित् कालानुपातादेव बलवत्त्वान्मारयति**
( चवि, ६.३ )
मोठा बलवान रोग. रोग बलवान असल्याने थोड्याच काळात तो मारतो.
पु., **कृमि०** ( सुउ. ५४.१२ ) कृमि.
**वनस्पति० चित्रकः** ( ध. २.८० ) चित्रक.
**–कर्मन्**–न., **कठिनीकरणम्, व्रणस्य षष्ट्युपक्रमेष्वेक उपक्रमः** ( सुचि. १.८ )
कठीण करणे. व्रणाच्या ६० उपचारांपैकी एक. मऊ व्रण असल्यास हा उपचार.
**–प्रतिबोधिन्**–वि., **कृच्छ्रोन्मीलिन्**
( अहृसू. १६.६ )
कष्टाने डोळे उघडणारा, पापण्या जड असलेला,

**दारुणक**–पु., क्षुद्ररोग० कफवातप्रकोपेण केशभूमिर्दारुणा, कण्डुरा, रूक्षा भवति प्रपाट्यते च (सुनि. १३.३५) द्र० 'दारणक'

**दारुणाख्य**–पु., रोग० दारुणकः, चूर्णकः इति पर्यायः (चइं, १२.५२) दारणा रोग.

**दारुणीभूत**–वि., परुषीभूतम्, रूक्षीभूतम् (चवि., ८.१२७)
रखरखीत खरखरीत झालेले.

**दार्ढ्य**–न., दृढता (अहसू. १६.९) वळकटपणा.

**दार्दुर**–वि., मण्डूकविषम्, दर्दुरस्येदमिति दार्दुरं (विषम्) (चचि. २३.२०९) बेडकाचे विष.

**–दंश**–पु., मण्डूककृतो दंशः (असंउ. ४३)
बेडकाचा दंश.

**दार्विका**–स्त्री., वनस्पति० गवेधुका (रा. ४.१८०)
गोजिव्हा (धान्य)

**दार्वी**–स्त्री., वनस्पति० दारुहरिद्रा (चसू. ५.६३)
दारुहळद.

**–करीरासव**–पु., आसुत० (सुसू. ४६.४३२)
दारुहळद आणि नेपतीचे आसव.

**–काथसमुद्भव**–न., भैषज्य० रसाञ्जनम् (ध. ३.१५८)
दारुहळदीचा काढा आटवून केलेला शिरा. (रसांजन)

**–घृत**–न., घृत० रक्तपित्तप्रबले कुष्ठे उपयुक्तम् (चचि. ७.१३५)
दारुहळदीचे तूप. अतितीव्र रक्तपित्त व कुष्ठ यात उपयुक्त.

**–हौमिकविधि**–पु., दार्वीहोमप्रोक्तकल्पः सप्रणवमहाव्याहृतिभिः ॐ भूः स्वाहेत्यादिभिर्हवनम् (सुसू. २.४)
होमाचा एक विधि. लाकडाच्या पळीने ॐ भूः स्वाहा इत्यादी मंत्राने करावयाच्या होमातला विधि.

**दार्व्यादिघृत**–न., घृत० त्रिदोषजाऽतिसारे उपयुज्यते (सुउ. ४०.७७–७८) (सुउ. ४०.१०४–१०५)
दारुहळद इत्यादी द्रव्यांनी केलेले तूप. त्रिदोषज अतिसारात उपयुक्त.

**दाल**–न., मधुभेदः दलोद्भवं मधु; गुणाः–कषायं, उष्णमम्लं, पित्तकृत्, कटुपाकि, छर्दिमेहप्रशमनं, रूक्षम् (सुसू. ४५.१३३) (सुसू. १३९.१४०) द्र० 'मधु'
मधाचा प्रकार, अतिसूक्ष्म माशांना दल म्हणतात; त्यांचा मध दाल. दल म्हणजे पान. पानाला लागलेल्या पोळ्याचा मध.

**दालगुण**–तुरट आंबट पचल्यानंतर तिखट उष्ण रूक्ष पित्तकर. ओकारी नाशक.

**दालन**–पु., दन्तरोग० अस्मिन् रोगे दन्तास्तीव्ररुगन्विता दाल्यन्ते। अयं वातजः (सुनि. १६.२८)
दाताचा रोग. यात दातात तीव्र वेदना होतात. व दात फुटतात, हा वातज.

**(दाला)**–स्त्री., वनस्पति० अरिः (रा. ८.४०)
खैराचा प्रकार.

**(दाली)**–स्त्री., वनस्पति० देवदाली (रा. ३.२४४)
देवडांगरी.

**दाव**–पु., वनाग्निः (असंसू. ४.२८) वणवा.

**–दीपित**–वि., दावाग्निप्रकाशितः (असंसू. ४.२८)
वणव्याने प्रकाशित.

**दावाग्निमल**–पु., भैषज्य० अग्निजारः (ध. परि. ६.२१)
अंबर.

**दाशपुर**–न., वनस्पति० जलमुस्तम् (ध. १.४३)
नागरमोथा.

**दाशमूलिकनिरूह**–पु., परिव० बस्तिभेदः, दशमूलसिद्धो निरूहः (चचि. १३.६५)
दशमुळाच्या काढ्याचा निरूहबस्ति.

**दासपुर**–न., वनस्पति० परिपेलम् (ध. ३.५५)
पांढऱ्या फुलांची रानातली सुगंधी वनस्पती.

**दासी**–स्त्री., वनस्पति० काकजङ्घा (ध. ४.२३)
कावळीचा प्रकार.
कुरण्टकः (रा. १०.४२०) कोऱ्हांटी.
नीलपुष्पा (रा. १०.४१७) निळी कोऱ्हांटी.

**–कुरण्टक**– पु., वनस्पति० कुरुण्डकः (सुसू. ३८.६) कोऱ्हांटी.

**दाह**–पु., रोग० सर्वाङ्गदहनमिव संतापः, चत्वारिंशत्पित्तविकारेष्वेकः (चसू. २०.१४) स सप्तप्रकारकः, तत्र प्रथमो मद्यजः–मद्यपानकुपितपित्तोष्मा पित्तरक्ताभिमूर्च्छितस्त्वचं प्राप्तो घोरं दाहं प्रकुरुते। तत्र पित्तवत्क्रियेषजम् (सुउ. ४७.५४) द्वितीयो रक्तजः–कृत्स्नदेहानुगं रक्तमुद्रिक्तं सद् अतीव दहति। तल्लक्षणानि–संचूषणं, दाहस्ताम्राभता, ताम्रलोचनता, लोहगन्धांगता, लोहगन्धवदनता, दहनावकीर्णवद् वेदना (सुउ. ४७.६७–६८) अन्ये तु रक्तजो भोजनं कुर्वतोऽनेकधा शोचतो रक्तेन दाहो भवति तेनात्यर्थं दह्यते।

तृष्णा, मूर्च्छा, प्रलाप इति ( सुउ. ४७.७६-७७ ) तृतीयः पित्तजः-पित्तज्वरसमानि लक्षणानि चिकित्साऽपि पित्तज्वरसमा कार्या ( सुउ. ४७.७७ ) चतुर्थस्तृष्णानिरोधजः-तृष्णानिरोधाद् अब्धातौ क्षीणे समुद्धतं तेजो मन्दचेतस आतुरस्य सबाह्याभ्यन्तरं देहं दहेत् । तेन संशुष्कगलताल्वोष्ठो जिह्वां निष्कृष्य चेष्टते। ( सुउ. ४७.७०-७१ ) पञ्चमोऽवगाढशस्त्रप्रहारजनितरक्तपूर्णकोष्ठजः ( मा ) रक्तेन पूर्णकोष्ठस्य दाहो दुःसहो भवति । तत्र सद्योव्रणीयोक्तं लक्षणं चिकित्सां च विद्यात् । ( सुउ. ४७.७३-७४ ) षष्ठो धातुक्षयजः-अस्मिन् दाहे मूर्च्छा, तृषा, क्षामस्वरः, क्रियाहीनता, भृशं सदनं, पीडेति लक्षणानि भवन्ति । तत्र वातघ्नी रक्तपित्तोक्ता क्रिया ( सुउ. ४७-७५ ) सप्तमो मर्माभिघातजः मर्मण्याघातेन दाहो भवति सोऽसाध्यतमः ( सुउ. ४७.७८ ) सर्वदाहेषु यदा आतुरस्य शीतगात्रता भवति, तदा ते सर्वेऽसाध्याः ( सुउ. ४७.७८ )
दाह. आग. सर्वांग जळते आहे अशी वेदना. चाळीस पित्तविकारांपैकी एक. प्रकार सात-१ मद्यापासून २ रक्तज ३ पित्तज ४ तहान रोखल्याने होणारा ५ कोठ्यात रक्तस्राव झाल्याने होणारा ६ धातूंचा क्षय झाल्याने होणारा ७ मर्मस्थानावर आघात झाला तर. **असाध्यत्व**-कोणत्याही दाहात रोग्याचे हातपाय थंड झाले तर तो असाध्य. मर्माघाताचा दाह ही असाध्य. **पहिल्यात** मद्यपानाचा इतिहास मिळेल. **दुसऱ्यात** लाली व लोखंडासारखी अंगाची घाण. **तिसऱ्यात** पिवळेपणा. **चौथ्यात** बाहेर व आतही आग आणि तोंड गळा इ. चा शोष फार. पाचव्याचे व सातव्याचे कारण स्पष्ट आढळते. सहाव्यात रोगी दिवसेदिवस थकत कृश होत जाईल.
**लक्षण० अग्निदग्धस्येव वेदना०** ( सुनि. १.३२ ) विस्तवाने जळाल्यासारखी वेदना.
**उपक्रम० अग्निकर्म दहनं शलाकाप्रभृतिभिः सिरासंकोचनार्थं शोणितस्थापनार्थं च, अनेन दग्धानां रोगापुनर्भावस्य सुश्रुतेनोक्तत्वात् उपक्रमविशिष्टत्वम्** ( सुसू. १४.४० ) ( सुसू. १२.३ )
एक उपचार-जाळणे, डागणे (सळई इत्यादींनी) रक्तस्राव आवरता येत नसेल तर शिरांचा संकोच व्हावा म्हणून व रक्त थांबावे म्हणून, तसेच जाळल्यानंतर रोग पुन्हा होत नाही म्हणून हा महत्वाचा उपचार.

**-प्रशमन**-पु., द्रव्यगण० महाकषायवर्गे एको गणः, दाहघ्नः ( चसू. ४.८ ) लाजाचन्दनकाश्मर्यफलमधूकशर्करानीलोत्पलोशीरसारिवागुडूचीह्रीबेराणीति दशेमानि दाहप्रशमनानि ( चसू. ४.१७ )
दाहशामक. लाह्या चंदन शिवण मोहाची फुले साखर निळे कमळ काळा वाळा अनंतमूळ गुळवेल वाळा ही दहा द्रव्ये दाहनाशक.

**दाहनी**-स्त्री., वनस्पति० धातकी ( रा. ६.५१ ) धायटी.

**दाहागरु**-न., वनस्पति० अगरुभेदः, द्र० 'अगरु' ( रा. १२.४३ ) अगरुप्रकार.

**दाहाभिभूत**-वि., दाहाधिक्येनाक्रान्तः ( सुउ. ४७.५८ ) दाहाने पिडलेला.

**दाहार्ह**-वि., दहनयोग्यः ( असंसू. ४०.५ )
जाळण्यास योग्य. डागण्यास योग्य.
पु., **वनस्पति० चित्रकभेदः**, कालः द्र० **'चित्रक'** ( रा. ६.१२७ )
चित्रकाचा प्रकार.

**-काष्ठ**-न., वनस्पति० अगरुभेदः, दाहागरु, ( रा. १२.४३ ) द्र० 'अगरु' अगरुप्रकार.

**-गल**-वि., लक्षण० लिप्तकण्ठः ( सुउ. ५३.६ ) लपेटलेला घसा.

**दिग्ध**-वि., **लिप्तम्** ( सुउ. ५३.६ )
लपेटलेले, माखलेले, लिंपलेले.
**युक्तम्** ( ड. सुउ. ६४.४३ ) सह, युक्त.

**-विद्ध**-वि., **विषलिप्तबाणताडितो व्रणः, तल्लक्षणानि-सद्यो विद्धं कृष्णरक्तं निःस्रवेद्व्रणः पाकं यायादभीक्ष्णं च दह्यते, क्षतात्कृष्णीभूतं क्लिन्नमत्यर्थं पूति, शीर्णमांसमनवरतं याति सोऽयं तृष्णामूर्च्छाभ्रान्तिदाहज्वरयुतो भवति** ( सुक. ५.५७-५८ )
विषारी बाणाचा व्रण. ताज्या व्रणातून काळे तांबडे रक्त स्रवते. सतत आग होते, व्रण पिकतो, व्रणातून काळे ओले अतिशय कुजके गळालेले मांस सारखे बाहेर येते. दाह, तहान, ताप, भ्रम, मूर्च्छायुक्त असतो.

**दिति**-स्त्री., **कश्यपस्त्री, दैत्यमाता** ( असंशा. १२ )
कश्यपाची स्त्री, दैत्यांची आई.

**दिन**-न., तिथिः ( सुसू. २९.१९ ) दिवस, तिथि.
**सप्तसंख्यामानम्** ( र. ११.१०३ ) सात ही संख्या.

**-कर**-पु., **खनिज० ताम्रम्** ( र. १३.५४ ) तांबे.

**-चर्या**-स्त्री., **दिने यच्चरणं तत्, प्रतिदिनं यत्कर्तव्यं तत्** ( अरु ) **दैनन्दिन आहारो विहारश्च**

( हे. अहसू. २ ) ( चसू. ५; सुचि. २४; असंसू. ३ ) दिने दिने चर्या दिनस्य वा चर्या; चर्या नाम चरणमाहारविहारचेष्टितमिति यावत्, प्रतिदिने यत्कर्तव्यम् ( अरु. अहसू. २०.१ ) स्वस्थपुरुष आयुषो रक्षार्थं ब्राह्मे मुहूर्ते रात्रेश्चतुर्घटिकावशेषे काले प्रबुद्ध्येत्, जीर्णाजीर्णनिरूपणादिकां शरीर-चिन्तां निर्वर्त्य, मूत्रपुरीषादेः कृतशौचविधानो दन्तशुद्धिं कुर्यात्, दन्तकाष्ठं भक्षयेत्, दन्तधावन-चूर्णेन वा दन्तान्विशोधयेत्, शीतजलेन लोचने सिञ्चेत्, सौवीरमञ्जनमक्ष्णोर्हितं नित्यं भजेत्, तथैव सप्तरात्रे श्लेष्मस्रावणार्थं रसाञ्जनं योजयेत्, ततो नावनगण्डूषधूमताम्बूलभाग्भवेत्, जराश्रम-वातनाशार्थं त्वग्दार्ढ्यार्थं च नित्यमभ्यङ्गमाचरेत्, शारीरलाघवार्थं कर्मसामर्थ्यार्थं च व्यायामं कुर्वीत, व्यायामानन्तरं देहमनुसुखं मर्दयेच्च, त्वक्प्रसादन-करं कफहरं चोद्वर्तनं कुर्यात्, ततः स्नानं कुर्यात्, स्नानेन कण्डूमलश्रमस्वेदतन्द्रातृषादाहादीनां शमो बलप्राप्तिश्च भवति, उष्णाम्बुनाधःकायस्य परिषेको बलावहः, केशचक्षुर्बलार्थिभिः शीतजलेन स्नात-व्यम्, पूर्वे आहारे सम्यग्जीर्णे हितं मितं भोक्तव्यं भोजनविधौ शास्त्रोक्तेनान्नपानेन भवितव्यम् ( अहसू. २ ) भुक्त्वा राजवदासीत यावदन्नक्लमो गतः, ततः पादशतं गच्छेदनन्तरं वामपार्श्वेन संविशेत् ( सुसू. ४६.४८७ )

दिनचर्या म्हणजे दिवसाची ठरलेली वागणूक, कार्यक्रम, करावयाची कार्ये. दैनंदिन आहारविहार स्वास्थ्याला अनुरूप आचार. स्वस्थ प्रकृतीच्या व्यक्तीने सूर्योदयापूर्वी दीड पावणेदोन तास अगोदर उठावे–अन्न जिरलेना हे लक्षात घ्यावे. सर्व ठीक आहेना पहावे. शौचाला जावे. तोंड धुवावे. मशेरी किंवा दातवणकाडी यांनी दात स्वच्छ करावे. थंड पाण्याचे शिपके डोळ्यांवर मारावेत. सौवीर अंजन नेहमी घालावे. दर सात दिवसांनी डोळे स्वच्छ व्हावेत म्हणून रसांजन घालावे. नंतर नाकात तेल घालावे. गुळण्या कराव्या, धूम्रपान करावे व विडा घ्यावा. नंतर अंगाला तेल लावावे. तेल लावल्याने काम करण्याचे सामर्थ्य वाढते, थकवा येत नाही, वात कमी होतो, म्हातारपण येत नाही. शक्ति वाढण्यास व शरीर हलके राहण्यास व्यायाम करावा. नंतर अंग चोळावे, चंपी करावी, उटणे लावावे, ते कफनाश करते व त्वचा प्रसन्न ठेवते. नंतर स्नान करावे ते कफनाश करते व त्वचा प्रसन्न ठेवते, घाम मळ खाज थकवा दाह झांपड तहान-नाशक आणि बलवर्धक आहे. डोक्यावर थंड पाणी घ्यावे म्हणजे केश व डोळे यांचे बल कायम राहते. खांद्यावरून गरम पाणी घ्यावे. ते बलवर्धक आहे. अगोदरचा आहार नीट पचल्यानंतर हितकर व योग्य प्रमाणात अन्न खावे. अन्नपान शास्त्र-विचारानुरूप घ्यावे. जेवण झाल्यावर राजासारखे आरामशीर बसावे, अन्नाची ग्लानि कमी झाल्यानंतर शतपावली करून डाव्या कुशीवर थोडा वेळ आडवे व्हावे.

**–जन्मन्**–न., प्रभातम् ( र. २०.२२० )
प्रभात. सकाळ.

**दिनान्ध**–पु., नेत्ररोग० **पित्तविदग्धदृष्टिः; अत्र भाव-प्रधाननिर्देशो द्रष्टव्यः, तेन दिनान्धत्वं प्राप्नोति इत्यर्थः** ( सुउ. १७.१२ )
दिवसा न दिसणे—दिवसा आंधळा. पित्ताने दृष्टि दुष्ट झालेला.

**–पति**–पु., खनिज० ताम्रम् ( र. १२.३९ ) तांबें.

**दिलीप**–पु., राज० **यत्पुत्रा राजतैलोपयोगेन** गतिमायु-र्बलं सुखं च लेभिरे ( का फक्करोगचिकित्सा )
एक राजा. ह्याच्या मुलांना राजतैलाच्या उपयोगाने आयुष्य, सुख आणि सद्गति प्राप्त झाली.

**दिवा**–अव्य० दिने ( सुशा. ४.४१ ) दिवसा.

**–करावर्त**–पु., शिरोरोग० **सूर्यावर्तः** ( काचि. ५ )
सकाळी सुरवात, माध्यान्हापर्यंत वाढ नंतर कमी अशी डोकेदुखी.

**–निद्रा**–स्त्री., दिवास्वप्नः ( सुशा. ४.४१ )
**'विकृतिर्हि दिवास्वप्नो नाम' तज्जन्यव्याधयः– अरोचकाविपाकाग्निनाशस्तैमित्यपाण्डुत्वकण्डूपामा-दाहच्छर्द्यङ्गमर्दहृत्स्तम्भजाड्यतन्द्रानिद्राप्रसङ्गग्रन्थि-जन्मदौर्बल्यरक्तमूत्राक्षितातालुलेपाः पिपासा श्लेष्म-पीडा च** ( चसि. १२.१४७ ) **प्रतिश्यायशिरोगौरव-ज्वराः** ( सुशा. ४.३८ ) **दिवास्वप्नाद् व्रणे शोफ-कण्डूरागरुक्पूयस्राववृद्धिर्भवति** (असंसू. ३८.२५)
**दिवास्वपनमपथ्यमप्यभ्यासान्नोपघातकम्** ( सुशा. ४.४१ )
**रात्रावपि जागरितवतां जागरितकालादर्धमिष्यते दिवास्वपनम्** ( सुशा. ४.३८ ) **बालवृद्धस्त्रीकर्षित-**

क्षतक्षीणमद्यनित्ययानवाहनाध्वकर्मपरिश्रान्तानाम-
भुक्तवतां मेदःस्वेदकफरसरक्तक्षीणानामजीर्णिनां च
मुहूर्तं दिवास्वपनमप्रतिषिद्धम् ( सुशा. ४.३८ )
श्वासहिध्मातिसारतृष्णाशूलपीडितानामपि हित-
करम् ( सुशा. ४.४८ )
दिवास्वापो ग्रीष्मादन्यत्र गर्हितः, अजीर्णिना
भोजनात्प्रागेव सुप्यताम् 'स्वप्यात्... अभुक्तवान्'
( असंसू. ७.२४४ )
दिवसा झोप. दिवसाची झोप. ही विकृतीच आहे. हिच्यामुळे **होणारे रोग**–अग्निनाश अपचन रुचिनाश ओले ओले वाटणे पांडुरोग खाज खरूज दाह अंग दुखणे हृदय जखडणे जडपणा झापड झोप वाढणे गाठी होणे दुर्बलता टाळुला लपेटली असे वाटणे तहान डोळे व लघ्वी लाल ओकारी कफविकार पडसे डोके जड आणि ताप. दिवसाच्या झोपेने जखमेत पू होतो वाढतो सूज खाज लाली आणि वेदना होतात. दिवसा झोप ही अपथ्यकर असली तरी तिची सवय असली तर ती घातक नाही. रात्री जागरण झाले तर दिवसा जागरणाच्या निम्मा वेळ झोप घ्यावी. मुले म्हातारे संभोग घेतलेले उरःक्षताने थकलेले नित्याचे मद्यपी प्रवासाने थकलेले यांनी तसेच मेद घाम कफ रस रक्त यांनी क्षीण व अजीर्ण झालेल्यांनी जेवणापूर्वी सुमारे पाउण तास झोप घ्यावी. श्वास उचकी अतिसार तहान शूळ यांनी पिडलेल्यांनीही दिवसा झोप घ्यावी. ग्रीष्मऋतूखेरीज इतर ऋतूत झोप अपथ्यकर. अजीर्णी मनुष्याने जेवणापूर्वीच झोपावे.

**–बलिन्**–वि., दिवा यस्य बलं प्रवृद्धं भवति, दिवा वा यो वर्धते स शोथः ( चचि. १२.१२ )
दिवसा जो बळावतो किंवा वाढतो तो शोथ.

**–स्वपन**–न., दिवानिद्रा (सुशा. ४.३८ )
दिवसा झोप. दिवसाची झोप.

**–स्वप्न**–पु., दिवानिद्रा (सुशा. ४.४८) दिवसाची झोप.

**–स्वप्नविकृति**–स्त्री., दिवास्वप्नजनिता विकृतिः; अस्यां कासश्वासप्रतिश्यायशिरोगौरवाङ्गमर्दारोचकाग्नि-दौर्बल्यानि भवन्ति (सुशा. ४.३८) द्र० 'दिवानिद्रा'
दिवसा झोप घेतल्याने होणारे विकार.

**–स्वप्नसात्म्य**–वि., दिवास्वप्नः सात्म्यं यस्य सः
( सुसू. ३५.३९ )
दिवसाची झोप ज्यांना आत्मसात् किंवा सवयीची झाली आहे असे.

**–स्वप्नोचित**–वि., दिवानिद्रा हितकरी यस्य सः
( अहृसू. ७.५९ )
दिवसाची झोप ज्याला हितकर तो.

**–स्वाप**–पु., दिवानिद्रा ( सुशा. ४.३८ )
दिवसाची झोप.

**दिविज**–न., वनस्पति० हरिचन्दनम् द्र० 'चन्दन'
( रा. १२.१९ ) पांढरे चंदन.

**दिवोदास**–पु., राज० ( सुसू. १.३ ) एक राजा.

**दिव्य**–वि., मेघजं जलम् ( सुनि. ३.२६ )
मेघाचे पाणी. पावसाचे पाणी.
पु., वनस्पति० यवः ( रा. १६.१२४ ) जव.
गुग्गुलुः ( रा. १२.१८४ ) गुग्गुळ.
सर्प० 'वासुकिस्तक्षकोऽनन्तः सगरः सगरालयः । तथानन्दोपनन्दाद्याः समिद्धाग्निसमप्रभाः' दिव्येभ्यो नमोऽस्तु तेषु क्रुद्धेषु चिकित्सा नास्ति (असंउ. ४१)
सर्प. नावे वर आहेत. यांच्या विषावर चिकित्सा नाही.
न., वनस्पति० हरिचन्दनम्, चन्दनम्
( रा. १२.१९ ) पांढरे चंदन.
लवङ्गम् ( ध. ३.४१ ) लवंग.

**( दिव्या )**–स्त्री., वनस्पति० श्वेतदूर्वा, द्र० 'दूर्वा'
(रा. ८.२२९) पांढरी दूर्वा.
ब्राह्मी ( रा. ५.१४९ ) ब्राह्मी.
महामेदा ( रा. ५.१६३ ) महामेदा.
वन्ध्याकर्कोटकी ( रा. ३.२७३ ) वांझकर्टोली.
हरीतकी ( रा. ११.३०७ ) हिरडा.

**–गन्ध**–वि., उत्तमगन्धः ( व्रणः ) अयं दिव्यगन्धो व्रणो मुमूर्षूणामेव विपरीताविपरीतगन्धत्वेन ज्ञेयः
( सुसू. २८.११ )
अति उत्तम वास सुगंध असलेला व्रण. मरणाराच्या व्रणाला हा येतो.
खनिज० गन्धकः ( रा. १३.१६७ ) गंधक.

**–( गन्धा )**–स्त्री., वनस्पति० बृहच्चञ्चुः
( रापरि. ४.२० ) मोठी चंचु.
भद्रैला ( रा. ६.७१ ) मोठी वेलची.

**–जल**–न., आन्तरीक्षं जलम् ( अहृसू. २०.३८ )
आकाशातील पाणी.

**–तुम्बी**–स्त्री., वनस्पति० भूतुम्बी ( रा. ७.२४१ )
भोपळ्याची एक जात.

**–तेजा**–स्त्री., वनस्पति० ब्राह्मी (ध. ४.१००) ब्राह्मी.

**–पुष्प**–पु., वनस्पति० करवीरः ( रा. १०.३) कण्हेर.

चम्पकः ( रा. १०.२३९ ) चाफा.

**–(पुष्पी)**–स्त्री., वनस्पति० महाद्रोणा ( रापरि. ५.५० ) एक वनस्पती.

**–मूलिका**–स्त्री., सोमवल्ल्यादिदिव्यौषधिः ( र. ११.८६ ) सोमवल्ली इत्यादी महौषधि.

**–रस**–पु., खनिज० पारदः ( रा. १३.४३ ) पारा.

**–लता**–स्त्री., वनस्पति० मूर्वा ( रा. ३.१० ) मोरवेल.

**–सार**–पु., वनस्पति० सर्जः ( रा. ९.२०५ ) राळ.

**दिव्यक**–पु. सर्प० निर्विषजातीयः ( सुक. ४.३४ (४) एक निर्विष साप.

**दिव्यानुकारिन्**–वि., गुणतो दिव्यजलसमं (जलम्) ( असंसू. ६ )
गुणाने आकाशातून पडणाऱ्या पाण्यासारखे.

**दिव्याम्भस्**–न., आन्तरीक्षं जलम्, इदं नेत्ररोगे चूर्णाञ्जनादिसाधने उपयुज्यते ( असंउ. १९ )
आकाशातले पाणी. डोळ्याच्या रोगात उपयुक्त. नेत्ररोगात आवश्यक चूर्ण अंजन इ० करण्यासाठी हे जल उपयोगात आणतात.

**दिव्येलक**–पु., सर्प० वैकरञ्जेभ्यस्त्रिभ्यो जातः, अयं राजिलसर्पवत् वर्तते ( सुक. ४.३४ ) द्र० ' सर्प '
वैकरंज तीन पैकी दोन जातीपासून झालेला साप. हा राजिलसर्पासारखाच असतो.

**दिव्योदक**–न., आन्तरीक्षं जलम् ; द्र० ' जल ' ( रा. १४.३२० )
आकाशातून पडलेले पाणी.

**दिव्योदकानुपान**–न., तनुपानार्थमान्तरीक्षं जलम् द्र० ' जल ' ( असंसू. ९.१५ )
आकाशातून पडलेल्या पाण्याचे अनुपान.

**दिव्यौषधि**–स्त्री., सोमलतादिकाश्चतुःषष्टिर्दिव्यौषधयः ( र. ८.७८ )
सोमवल्ली इत्यादी चौसष्ट दिव्य औषधि.

**दिश्**–स्त्री., दिशा ( चसू. १.४८ ) दिशा.
देवता० श्रोत्रस्याधिदैवतम् ( सुशा. १.७ )
कानाचे–कर्णेंद्रियाचे आधिदैवत.

**(दिक्–)प्रासादा**–स्त्री., वनस्पति० कुलत्था ( रा. १३.२१९ ) कुळीथ.

**–संख्या**–स्त्री., दशदिशः–प्राच्याग्नेयीदक्षिणानैर्ऋतीप्रतीचीवायव्युदीचीशान्यूर्ध्वाऽधराः ( र. २३.७५ )
दहा दिशा पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर, ईशान्य, आग्नेयी, नैर्ऋत्य, वायव्य, ऊर्ध्व आणि अधर.

**(दिग्–) वासस्**–वि., नग्नः ( चनि. ७.१४. )
नागवा, नागडा, नग्न.

**दीक्षा**–स्त्री., गुरुतो मन्त्रादिग्रहणम् ( सुसू. ६.२१ )
दीक्षा. गुरुपासून मंत्रादि घेणे.

**दीन**–वि., लक्षण० क्लिष्टचित्तः ( ड. सुउ. ३९.१४३ )
कष्टी, केविलवाणा. हताश. निराश.
अगम्भीरः (चक्र. चचि. २८.४१) गंभीर नसलेला.
न., वनस्पति० तगरम् ( ध. ३.५३ ) तगर.

**–मनस्**–वि., क्लिष्टचित्तः ( सुउ. ३९.२९१ )
द्र० ' दीन '

**दीनार**–पु., मान० निष्को त्रिंशद्गुञ्जामानं वा ( र. ११-१०३ ) वजन. ३२ गुंजा किंवा ३० गुंजा.

**दीप**–पु., स्नेहाशः ( दीपकः ) ( चशा. ५.१५ )
दीपक. दिवा.

**–गन्ध**–पु., दीपस्य गन्धः ( असंशा. १०.९ )
दिव्याचा वास.

**–वह्नि**–दीपाकारोऽग्निः ( र. १२.१६१ )
दिव्यासारखा कमी ( मंद ) अग्नि.

**–वृक्ष**–पु., वनस्पति० सरलः (ध.३.७८) सरळदेवदार.

**दीपक**–पु., औदर्याग्निः, दीपकः ( र. १६.१५५–५८ )
पाचकाग्नि वाढवणारा.
वनस्पति० कासमर्दः ( रा. ४.१७७ ) कासविंदा.
जीरकम् ( रा. ६.१०० ) जिरे.
यवानी ( ध. २.९१ ) ओवा.
सर्प० अयं राजीमद्वर्गीयः बिलेशयेष्वेकः तन्मांसगुणाः–मधुरः कटुपाकी सृष्टविण्मूत्रमारुतोऽतिचक्षुष्यः ( सुसू. ४६.८४ )
एक साप. राजीमन् या जातीचा. **मांसगुण**–गोड पचनानंतर तिखट, मळमूत्र वात सहज बाहेर काढणारे व डोळ्यांना अतिशय हितकर.

**दीपन**–वि., जाठराग्निदीप्तिकरम् ( र. २.३ )
पाचकाग्नि प्रदीप्त करणे.
पु., जाठराग्निः ( र.३.३२ )
जठराग्नि. अन्नपाचक अग्नि.
न., अग्निभूयिष्ठं द्रव्यम् ( सुसू. ४१.६ )
अग्निगुणाधिक ( तीक्ष्णउष्ण ) द्रव्य.
पारदसंस्कारविशेषः स्वर्णताम्रादिधातुभिः सैंधवादिपाषाणादिभिः सर्पाक्ष्यादिमूलैश्च घटयन्त्रमध्यस्थस्य पारदस्य बुभुक्षितत्वजननेन कवलीकरणशक्त्युत्पत्त्यर्थं दिनत्रयपर्यन्तं स्वेदनम् ( र. ८.७० )

पाऱ्याचा एक संस्कार. सोने तांबे इ. धातु सैंधव इ. व पाषाण सर्पाक्षि इ. च्या मुळांनी घटयंत्रातील पाऱ्याला बुभुक्षित करून ग्रासशक्ति वाढविण्यासाठी तीन दिवस स्वेदन करणे.

पु., **वनस्पति० पलाण्डुः** ( रा. ७.१०० ) कांदा.

**( दीपनी )**–स्त्री., **वनस्पति० पाठा** ( रा. ६.१९ ) पहाडमूळ.

**मेथिका** ( ध. ६.१११ ) मेथी.

**यवानी** ( ध. २.९१ ) ओवा.

**–जीवन–**(रसेन्द्रः)–पु., **पारदयोग० गन्धकसैन्धवपिप्पलीचित्रकादियुक्तः शोथहलीमककामलाशूलाजीर्णनाशकः** ( र. १६.१६६ ) पाऱ्याचा योग–गंधक सैंधव पिंपळी चित्रक इत्यादीयुक्त पाऱ्याचा योग–सूज हलीमक कावीळ शूळ अजीर्ण नाशक.

**दीपनीय–**पु., **अग्निदीप्तिकरः; महाकषायवर्गे एको गणः** ( चसू. ४.८ ) **पिप्पलीपिप्पलीमूलचव्यचित्रकशृङ्गवेराम्लवेतसमरिचाजमोदाभल्लातकास्थिहिङ्गुनिर्यासा इति दशेमानि दीपनीयानि** ( चसू. ४.९ ) अग्नि प्रदीप्त करणारा एक वर्ग. पिंपळी पिंपळमूळ चवक चित्रक सुंठ अम्लवेतस मिरे ओवा भिलावा हिंग या दहांचा वर्ग.

**वनस्पति० यवानी** ( ध. २.९१ ) ओवा.

**( दीपनीया )**–स्त्री., **वनस्पति० यवानी** ( ध. २.९१ ) ओवा.

**–गण–( वर्ग )** पु., **दीपनीयो वर्गः** ( असंसू. १५ ) अग्निदीपक गण.

**–वर्ग–**पु., **दीपनीयद्रव्याणां समूहः** ( चसू. ४.९ असंसू. १५ ) अग्निदीपक द्रव्यांचा गण.

**दीपाग्नि–**पु., **दीपस्येव मन्दोऽग्निः** ( र. १६.१५७ ) दिव्यासारखा मंद अग्नि.

**दीपाशय–**पु., **दीपधारिका, दीपगृहं वा** (चशा. ५.१५) दीपगृह, दीपमाळ.

**दीपिका–**स्त्री., **वनस्पति० वनमेथिका** ( रा. ५.१८४ ) रानमेथी.

**–यन्त्र–**न., **यन्त्र० दीपिकायन्त्रम्, इदं पारदस्य तिर्यक्पातनसंस्कारे समुपयुज्यते** ( र. ११.४१ ) पाऱ्याचे तिरके पातन करण्यास पाऱ्याची वाफ आडवी नेण्यास उपयुक्त यंत्र.

**दीपिका–**स्त्री., ( सुउ. २१.२१–२२ ) एका तेलाचे नांव.

**–तैल–**न., **तैल० महत्पञ्चमूलयुक्तम्, कर्णवेदनाहरतैलम्** ( सुउ. २१.२१–२२ ) मोठे पंचमूळयुक्त विशिष्ट विधीने पेटवून गळालेले तेल. कानातील शूळनाशक तेल.

**–यन्त्र–**न., **यन्त्र० जलपूर्णपात्रमध्यगते घटखर्परे मृत्तिकामयीं वङ्कनालाकारां नलिकां स्थापयित्वा तस्योपरिभागे क्षारलवणसहितः पारदः स्थाप्यते, ततः सन्धिरोधं विधायाग्निः प्रदीयतेऽन्यनलिकया चोर्ध्वभागाच्च पारदस्तिर्यक् पात्यते–इदं दीपिकायन्त्रम्** ( र. ९.१६ ) पाण्याने भरलेल्या भांड्यात, मातीचे परळ ठेवावे, त्यात त्याला एक नळी जोडावी, ती पाण्यात सोडावी. त्या भांड्यात, क्षार लवण युक्त पारा ठेवावा. त्यावर दुसरे परळ पालथे ठेवून संधिलेप करावा. त्यावर अग्नि पेटवावा, म्हणजे पाऱ्याची वाफ होऊन जोडलेल्या नळीतून पाण्यात जाऊन साठेल. हे दीपिकायंत्र.

**–रस–**पु., **पारदयोग० पिप्पलीजम्बीरकुमारीयुक्तः, अयं सर्वज्वरघ्नः** ( र. १२.२३–२७ ) पाऱ्याचा योग. पिंपळी निंबु कोरफडयुक्त. सर्व ज्वर नाशक.

**दीप्त–**पु., न., **नासारोग०** ( चचि. २६.११७ ) **दाहयुक्तायां नासायां निःश्वासो यदा धूमवद्बहिरायाति नासा च [illegible] भवति [illegible] अयं रोगो ज्ञेयः** ( सुउ. २२.१४–१५ ) नाकाचा रोग. नाकात आग होते व निःश्वास जेव्हा धुरासारखा बाहेर येतो तेव्हा नाक जळत आहे असे वाटते.

न., **खनिज० कांस्यम्** ( रा. १३.२४ ) कांसे.

**सुवर्णम्** ( रा. १३.२ ) सोने.

**वनस्पति० हिङ्गु** ( रा. ६.३० ) हिंग.

**दीप्तक–**न., **खनिज० कांस्यम्** ( रा. १३.२४ ) कांसे.

**( दीप्ता )**–स्त्री., **वनस्पति० कलिकारी** ( ध. ४.९ ) कळलावी.

**ज्योतिष्मती** ( रा. ३.३९५ ) मालकांगोणी.

**सातला** ( ध. १.२३८ ) शिकेकाई.

वि., **सूर्योद्भासिता दक्षिणा वा ( दिक् )** ( चइ. १२.२९–३० ) सूर्य ज्या दिशेस असतो ती अथवा दक्षिण दिशा.

**दीप्ताग्नि**–पु., प्रदीप्तो जाठराग्निः ( र. २.५९ )
प्रदीप्त अन्नपाचक अग्नि.

**दीप्तामर**–पु., पारदयोग० गन्धकताम्रयुक्तः पित्तगुल्मनाशकः ( र. १८.६२–६६ )
पाऱ्याचा गंधक तांबेयुक्त योग; पित्तगुल्मनाशक.

**दीप्ति**–स्त्री., जठराग्निदीपनम् ( चसू. १३.४३ )
जठराग्नि प्रदीप्त होणे.
भैषज्य० लाक्षा ( ध. ३.८२ ) लाख.
नासारोग० दीप्तम् ( असंउ. २३ ) नाकाचा रोग.

**दीप्य**–पु., वनस्पति० निम्बूकः ( रा. ११.२२ ) निंबू.
यवानी ( ध. २.९१ ) ओवा.
जीरकम् ( रा. ६.१०० ) जिरे.
न., जीरकम् ( ध. २.६६ ) जिरे.

**( दीप्या )**–स्त्री., वनस्पति० खर्जूरभेदः ( ध. ५.५५ )
द्र० 'खर्जूर'
खजूर, एक प्रकार.
उपकुञ्ची ( रा. ६.९१ ) स्थूल जिरे.

**दीप्यक**–पु., वनस्पति० अजमोदा
( सुउ. ५७.८, ध. २.९८ ) अजमोदा, ओवा.
यवानी ( रा. ६.१४० ) ओवा.

**दीर्घ**–वि., आयतम् ( चवि. ८.११७ ) लांब.
पु., वनस्पति० माडः ( ध. ५.७० )
ताडाचा प्रकार, नारळ.
व्रीहिः ( रा. १६.११२ ) तांदूळप्रकार.
स्त्री., वनस्पति० पृश्निपर्णी (रा. ४.११८) पिठवण.

**–कणा**–स्त्री., वनस्पति० जीरकभेदः, शुक्लजीरकः
( ध. २.६८ ) द्र० 'जीरक'
जिरेप्रकार, पांढरे जिरे.

**–कण्ट**–पु., वनस्पति० बर्बुरः ( रा. परि. ८.१२ )
बाभूळ.

**–कन्द**–पु., वनस्पति० मुखालुः ( रा. परि. ७.२२ )
एक गोड कंद.

**–कन्दक**–न., वनस्पति० मूलकम् (रा. ७.५१) मुळा.

**( –कन्दिका )**–स्त्री., वनस्पति० मुसलीकन्दः
( रा. परि. ७.५८ ) मुसळी ( कंद )

**–काण्ड**–स्त्री., वनस्पति० गुण्डः
( रा. परि. ८.६० )
लांब त्रिकोणी कांडाची तलवारीच्या पानासारखी पाने असलेली वनस्पती.

**( –काण्डा )** स्त्री., वनस्पति० वत्सादनी
( रा. परि. ३.३३ )
मोठे कांड असलेली एक सोमवल्ली.

**–काल**–पु., वनस्पति० अङ्कोटः ( रा. ९.३८४ )
अंकोल.

**–कीलक**–पु., वनस्पति० अङ्कोलः ( ध. १.२५८ )
अंकोल.

**–कूरक**–न., धान्य० व्रीहिः ( रा. १६.८१ )
तांदूळप्रकार.

**–कृष्णा**–स्त्री., धान्य० व्रीहिः ( रा. १६.१०८ )
तांदूळप्रकार.

**–ग्रन्थि**–पु., वनस्पति० गजपिप्पली
( रा. ६.११७ ) गजपिंपळी.

**–च्छद**–पु., वनस्पति० शाकः ( ध.परि. ५.३ ) साग.

**–जिह्वी**–स्त्री., असुरकन्या ( का. रेवतीकल्प. ६ )
असुराची कन्या.

**–जीरक**–पु., वनस्पति० जीरकभेदः, शुक्लजीरकः
( ध. २.६८ ) द्र० 'जीरक'
जिऱ्याचा प्रकार, पांढरे जिरे.

**–तरु**–पु., वनस्पति० तालः ( ध. ५.६८ ) ताड.

**–तुण्डनखी**–स्त्री., बिलेशयप्राणि० चुचुन्दरी
( ध. ६.४३२ ) चुचुंदरी.

**–तुण्डी**–स्त्री., बिलेशयप्राणि० चुचुन्दरी
( ध. ६.४३२ ) चुचुंदरी.

**–तृण**–पु., वनस्पति० पल्लिवाहः ( रा. परि. ८.५६ )
तांबड्या रंगाचे लांब गवत.

**–दण्डक**–पु., वनस्पति० एरण्डः
( ध. १.२९५ ) एरंड.

**–दण्डी**–स्त्री., वनस्पति० गोरक्षी ( रा. परि. ५ )
लांब दांड्याची पाच पानांची पुष्कळ वास येणारी चित्रविचित्र रंगाची वनस्पती.

**–दर्शिन्**–वि., दूरदर्शी ( च. शा. ४.३७ ( ३ )
दूरदर्शी.

**–द्रुम**–पु., वनस्पति० शाल्मली ( रा. ८.२१२ )
सावर. सावरी.

**–नाद**–पु., भैषज्य० शङ्खः ( ध. ३.१७९ ) शंख.

**–नाल**–पु., वनस्पति० गुण्डः ( रा. परि. ८.६१ )
लांब त्रिकोणी कांडाची तलवारीच्या पानासारखी पाने असलेली वनस्पती.
जूर्णा ( रा. १६.१६७ ) जोंधळा.
कत्तृणम् ( रा. ८.१०८ ) रोहिसगवत.

**–निःस्वन**–पु., भैषज्य० शङ्खः (ध. ३.१७९) शंख.

**–नेत्र**–न., बस्तिनेत्रदोषः दीर्घबस्तिनेत्रजन्यो दोषः अतिगतिर्नाम दूरप्रवेशः ( चसि. ५.४–५ )
बस्तीच्या बळीचा दोष. ( नळी अधिक गेल्याने )

**-पटोलिका**-स्त्री., वनस्पति० **पटोली**
( ध. १.५२ रा.७. ७६ ) गोड पडवळ.
**-पत्र**-पु., वनस्पति० **तालः** ( रा. ९.९३ ) ताड.
**पलाण्डुः, राजपलाण्डुः** (रा. ७.१०३) उत्कृष्ट कांदा.
**पुनर्नवा** ( ध. १.२७४ ) पुनर्नवा.
**जलमधूकः** ( ध. ५.४९ ) ज्येष्ठमध.
**शरः** ( रा. ८.२०९ )
शर तृण, दर्भप्रकार, बाणगवत.
**( -पत्रा )**-स्त्री., वनस्पति० **अन्यादोडी**
( रा. परि. ४.४१ ) हरिणदोडीचा प्रकार.
**कदली** ( ध. ४.७५ ) केळ.
**केतकी** ( रा. परि. १०.२ ) केवडा.
**गन्धपलाशः** ( ध. १.६४ ) (रा. ६.९०) कचोरा.
**द्रोणपुष्पी** ( रा. परि. ५.४८ ) द्रोणपुष्पी.
**-पत्रक**-पु., वनस्पति० **हिज्जुलः** ( रा. परि. ८.७० )
जलवेतस.
**इक्षुः** ( सुसू. ४५.१५४ ) ऊस.
**जलदः** ( ध. ५.४८ ) ज्येष्ठमधप्रकार.
**वेतसः** ( ध. ५.११६ ) वेत.
**लशुनः** ( ध. ४.६६ ) लसूण.
**( -पत्रिका )**-स्त्री., वनस्पति० **कुमारी, गृहकन्या**
( रा. परि. ५.१० ) कोरफड.
**शालिपर्णी** ( रा. ४.११३ ) सालवण.
**वचा, श्वेतवचा** ( रा. ६.१० ) पांढरा वेखंड.
**( -पत्री )**-स्त्री., वनस्पति० **पलाशी** ( रा. परि. ३.५० )
लांब व आंबट पानांची लांब वेल.
**बृहच्चञ्चुः** ( रा. परि. ४.२० )
लांब पानांची मोठ्या चोचीसारखी फळे असलेली चांगला वास असलेली वनस्पती.
**-पर्ण**-पु., वनस्पति० **जरणद्रुमः** ( रा. परि. ९.१३ )
एक वनस्पती.
**( -पर्णी )**-स्त्री., वनस्पति० **पृश्निपर्णी** ( ध. १.९१ )
( रा. ४.११८ ) पिठवण.
**त्रपुसम्** ( ध. १.१७५ ) काकडीप्रकार.
**-पल्लव**-पु., वनस्पति० **शणः** (रा. परि. ४.१०) सण.
**-पादप**-पु., वनस्पति० **पूगः** (रा. ११.७१) सुपारी.
**तालः** ( रा. ९.९२ ) ताड.
**-पुच्छिका**-स्त्री., प्राणि० **गोधा** ( रा. १९.१७ )
घोरपड.
**-पुत्र**-पु., वनस्पति० **जलमधूकः** ( ध. ५.४९ )
ज्येष्ठमधप्रकार.

**-पुष्प**-पु., वनस्पति० **श्वेतमन्दारकः** ( रा. १०.३१ )
पांढरी रुई. पांढरा मंदार.
**-प्रेक्षण**-वि., **दीर्घदृष्टिः आयताक्षः** ( सुसू. ३५.४ )
दीर्घ दृष्टीचा, लांबट डोळ्यांचा.
**-फल**-पु., वनस्पति० **आरग्वधः** ( ध. १.२१९ )
बहावा, शेंग.
**-फलक**-पु., वनस्पति० **अगस्त्यः** (रा. परि. १०.१३)
हदगा.
**( -फला )**-स्त्री., वनस्पति० **द्राक्षा, मृद्वीका**
( रा. ११.७६ ) द्राक्ष. मनूका.
**जन्तुका** ( ध. ४.८८ ) ( रा. ३.१२९ )
खाजकुहिलीच्या शेंगेसारखी पण लांब व वाकड्या शेंगेची वनस्पती. लाख.
**कोशातकी** ( रा. ७.२८८ ) दोडकी.
**-बीजा**-स्त्री., वनस्पति० **क्षीरतुम्बी** ( रा. ७.२३८ )
दुधी. दुध्या भोपळा.
**-मूल**-पु., वनस्पति० **बिल्वान्तरः** ( रा. परि. ८.३० )
एक वनस्पती.
**यासः** ( ध. १.२२ ) धमासा.
**मोरटः** ( ध. १.१५ ) मोरवेलप्रकार.
न., **लामज्जकम्** ( ध. ३.८६ ) वाळा.
**( -मूला )**-स्त्री., वनस्पति० **मोरटः** ( ध. १.१५ )
मोरवेलप्रकार.
**धन्वयासः** ( सुसू. ३८.४५ ) धमासा.
**शालिपर्णी** ( सुसू. ३८.४५ ) ( ध. १.८८ )
सालवण.
**-मूलक**-पु., वनस्पति० **शरः** ( रा. ८.२१२ )
बाणगवत.
न., **मूलकम्** ( रा. ७.५० ) मुळा.
**-रङ्गा**-स्त्री., वनस्पति० **हरिद्रा** (ध. १.५५) हळद.
**-रागा**-स्त्री., वनस्पति० **हरिद्रा** ( ध. १.५५ ) हळद.
**-रोहिषक**-न., वनस्पति० **कत्तृणम्** ( रा. ८.१०८ )
रोहिसगवत.
**-वल्ली**-स्त्री., वनस्पति० **वत्सादनी**
( रा. परि. ३.३३ )
लांब व बळकट काडी असलेली लांब वेल, एक सोमवल्ली.
**पलाशी** ( रा. परि. ३.४९ )
आंबट व लांब पानांची लांब वेल.
**इन्द्रवारुणी** ( रा. ३.३७६ ) कवंडळ, इंद्रावण.
**-वालुक**-पु., वनस्पती० **वृद्धदारुः** ( ध. ४.१०७ )
एक वनस्पती. वरधारा.

**-वृत्त**-पु., **वनस्पति० विष्णुकन्दः** ( रा. परि. ७.४० )
लंबगोल मोठा पाण्यात होणारा कंद.

**-( वृत्ता )**-स्त्री., **वनस्पति० इन्दीवरी**
( रा. परि. ३.२७ )
फुलांची मंजरी असणारी व लंबगोल जोडफळाची वनस्पती.

**-वृत्तफला**-स्त्री., **वनस्पति० क्षीरतुम्बी**
( रा. ७.२३८ ) दुधी, दुध्याभोपळा.

**-वृन्त**-पु., **वनस्पति० टेण्टुकः**
( सुउ. ४०.८१ अहृसू. १७. ८) टेंटु.

**-वृन्तक**-पु. **वनस्पति० टिण्टुकः** ( रा. ९.१४१ )
टेंटु.

**-शर**-पु., **धान्य० जूर्णा** ( रा. १६.१६७ ) जोंधळा.

**-शाख**-पु., **वनस्पति० शणः** ( रा. परि. ४.१० ) सण.

**-( शाखिका )**-स्त्री., **वनस्पति० नीलाम्ली**
( रा. परि. ४.३८ )
लांब शाखेची निळी वनस्पती.

**-शिम्बिक**-पु., **वनस्पति० राजमाषः**
( रा. १६.१३५ ) चवळी.

**-शूक**-पु., **धान्य० शालिः**
( चसू. २७.८; अहृसू. ६.१ ) साळ. तांदूळ.

**-सूत्रता**-स्त्री., **चिरेण कार्यकारित्वम्** ( चनि. १.३३ )
फार अधिक वेळ घालवून काम करणे. विलंबे कार्यकारित्व.

**-सूत्री**-वि., **चिरकारी** ( असंशा ८.१६ )
विलंबी. चिरकार्यकारी.

**-स्कन्ध**-पु., **वनस्पति० तालः** ( ध. ५.६८ ) ताड.

**दीर्घक**-पु., **वनस्पति० जीरकभेदः शुक्लजीरकः**
( ध. २.६८ ) **द्र० 'जीरक'** पांढरे जिरे.
न., **वनस्पति० जीरकम्** ( ध. २.६६ ) जिरे.

**( दीर्घिका )** स्त्री., **सोपानपुष्करिणी** (सुउ. ४७.५७)
पायऱ्यांचा सर्व बाजूंनी घाट बांधलेले छोटे तळे.
**वनस्पति० हिङ्गुपत्री** ( २.३८ ) बाफळी.

**दीर्घाङ्गुलिपर्वन्**-वि., **महाङ्गुलिग्रन्थिप्रमाणः**
( सुसू. ३५.४ )
ज्याची बोटे व बोटांची पेरे लांब आहेत तो.

**दीर्घात्यर्क**-पु., **वनस्पति० श्वेतमन्दारकः** (रा. १०.३१ )
पांढरा मांदार, पांढरी रुई.

**दीर्घायुस्**-वि., **शतवर्षपर्यन्तमायुर्यस्य सः तत्र महापाणिपादपार्श्वपृष्ठस्तनाग्रदशनवदनस्कन्धललाटं दीर्घाङ्गुलिपर्वोच्छ्वासप्रेक्षणबाहुं, विस्तीर्णभ्रूस्तनान्तरोरस्कं ह्रस्वजङ्घामेढ्रग्रीवं, गम्भीरसत्त्वस्वरनाभिमनुच्चैर्बद्धस्तनमुपचितमहारोमशकर्णं, पश्चान्मस्तिष्कं स्नातानुलिप्तं मूर्धानुपूर्व्या विशुष्यमाणशरीरं पश्चाच्च विशुष्यमाणहृदयं पुरुषं दीर्घायुषं जानीयात्**
( सुसू. ३५.४ )
दीर्घायुषी-शंभर वर्षांपर्यंत आयुष्य असणारा. मोठे लांब हात, पाय, फासळ्या, पाठ, स्तन; स्तनाग्र, दात, तोंड, खांदे, कपाळ; लांब बोटे, व पेरी, दीर्घ श्वास; मोठे डोळे व बाहू; भुवया स्तनातील अंतर व उर ही विस्तीर्ण, पण मान पिंडरी व शिश्न लहान, स्वर व मन गंभीर, बेंबी खोल, स्तन थोडे उंच बांधीव पुष्ट; मोठे लोम असलेले व पुष्ट कान, पाठीमागें पुढे आलेले डोके, स्नान केले, उटणे लावले तर प्रथम डोके व शेवटी हृदयावरचा भाग सुकणारा पुरुष दीर्घायुषी समजावा.
पु., **वनस्पति० शाल्मली** ( रा. ८.२१२ )
सावरी. सावर.
**जीवकः** ( रा. ५.१५५; ध. १.२२ )
अष्टवर्गापैकी एक वनस्पती.

**दीर्घोर्वारु**-पु., **वनस्पति० डङ्गरी** ( ध. १.१८१ )
लाल मोठा भोपळा, डांगर.

**दुःकोष्ठ**-वि., **क्रूरकोष्ठः** (सुचि. ३३.१५) जड कोठ्याचा.

**दुःख**-न., **प्रतिकूलवेदनीयम्** ( चवि. ८.३९ )
**कायवाङ्मानसी पीडा** ( सुसू. १.२३ )
प्रतिकूल वेदना. काया वाचा मन यांची पीडा.
**रोगः** ( चक्र. चशा. १.९२ ) **पीडा, तच्च दुःखं त्रिविधमाध्यात्मिकमाधिभौतिकमाधिदैविकमिति**
( सुसू. २४.४ )
रोग, पीडा प्रकार तीन-वातादि व रजस्तम दोषांनी होणारे आध्यात्मिक, प्राण्यांच्या आक्रमणाने होणारे आधिभौतिक व देव असुरांपासून होणारे रोग दुःख आधिदैविक होय.
वि., **दुःखकरः, दुःखबहुलः कष्टसाध्यो वा**
( चचि. ३.४८ )
दुःखकर, अधिक दुःखकर, कष्टाने साध्य होणारा.

**-जीविन्**-वि., **दुःखी, दुःखेन जीवितुं शीलमस्य**
( असंसू. ३.७८ ) दुःखी.

**-प्रसविनी**-वि., **दुःखेन प्रसूते या सा**
( चचि. १६.४६ ) कष्टाने प्रसूत होणारी

**–बहुलता**–स्त्री., दुःखाधिक्यम् ( सुशा. १.१८ )
दुःखाचे आधिक्य. पुष्कळ दुःख असणे.

**–वर्धन**–पु., कर्णरोग० कर्णपालीरोगः
( सुचि. २५.३ )
**कर्णौ दुर्विद्धः सन् वर्धितस्तस्मिन् कण्डूदाहपाकरुजावान् संनिपातजः शोफो भवति** ( असंउ. २१ )
कानाच्या पाळीचा रोग. कान चांगला टोचला गेला नाही व तो वाढविला तर त्यात खाज आग वेदना पिकणे व सूज होते. हा त्रिदोषज विकार.

**–वृद्धि**–स्त्री., कर्णरोग० दुःखवर्धनः ( र. २४.१ )
पहा ' दुःखवर्धन '.

**–शय्या**–स्त्री., दुःखोत्पादिका शय्या ( चचि. २.९ )
ज्या शय्येवर झोपले असता त्रास होतो ती.

**दुःखाश्रय**–पु., शरीरम् ( चक्र. चशा. १.९५ )
दुःखाचा आश्रय. शरीर.

**दुःशुद्ध**–वि., अयोगेनाविशुद्धम् ( चक. १२.६४ )
वमन रेचन इ० चांगले लागू न झाल्याने चांगले शुद्ध न झालेले ( दुःशुद्ध ) अशुद्ध शरीर.

**दुःस्पर्शा**–स्त्री., वनस्पति० धन्वयासः ( सुचि. ११.९ ) ( ध. १.२० ) धमासा.
**कण्टकारी** ( ध. १.९५ ) रिंगणी.
**कपिकच्छूः** ( रा. ३.२०१ ) खाजकुहिली.

**दुकूल**–न., सूक्ष्मं क्षौमम्, श्लक्ष्णवस्त्रभेदः
( सुशा. ३.२३ )
सूक्ष्म रेशमी वस्त्र. चिकण वस्त्राचा प्रकार.
**पट्टवस्त्रम्** ( सुसू. १८.१६ ) रेशमी वस्त्र.

**–पट्ट**–न., पट्टवस्त्रम् ( ड. सुशा. ३.२३ )
रेशमी वस्त्र.

**दुग्ध**–न., आहारद्रव्य० उत्पत्तिः–**स्त्रीगोमहिष्यादिभ्यः संभवः। दुग्धगुणकर्माणि–प्रायशो मधुरं, मधुरपाकि, शीतं, स्निग्धं, प्रीणनं, बृंहणं, वृष्यं, मेध्यं, बल्यं, मनस्करं, जीवनीयानां श्रेष्ठं, श्रमहरं, विहतसंधानं, सर्वप्राणभृतां सात्म्यं, शमनं, शोधनीयं, दीपनीयं, वातपित्तघ्नं, श्वासकासरक्तपित्ततृष्णाक्षीणक्षतपाण्डुरोगाम्लपित्तशोषगुल्मोदरातिसारज्वरदाहशोथयोनिशुक्रप्रदोषाप्रचुरमूत्रग्रथितपुरीषेत्यादिषु पथ्यं प्रशस्तं च; नस्यालेपावगाहेषु वमनास्थापनेषु विरेचने स्नेहने च दुग्धं सर्वत्रोपयुज्यते।**
( चसू. १.१०७–१२ )
**दुग्धमनेकौषधिरसप्रसादं प्राणदं गुरु पिच्छिलं श्लक्ष्णं सरं मृदु सर्वप्राणिनामप्रतिषिद्धं जातिसात्म्याद् जीर्णज्वरोन्मादमूर्च्छाभ्रममददाहहृद्बस्तिदोषप्रवाहिकाग्रहण्यर्शःशूलगर्भास्रावेषु प्रशस्तं क्लमहरं पाप्मापहं वाजीकरणं रसायनं वयःस्थापनमायुष्यं तुल्यगुणत्वादोजसो वर्धनं बालवृद्धानां क्षुद्व्यवायव्यायामकर्शितानां च पथ्यतमम्** ( सुसू. ४५.४९ ) **प्राधान्येन दुग्धमष्टविधम्–गव्यं माहिषमाजं स्त्रैणमाविकमैभं कारभमेकशफं चेति** ( असंसू. ५२.५४ ) **दुग्धं रसस्य उपधातुः रसात् स्तन्यं प्रासादजम् प्राधान्येन दुग्धमष्टविधम्–गव्यं माहिषमाजं स्त्रैणमाविकमैभं कारभमेकशफं चेति** ( असंसू. ५२.५४ ) ( चचि. १५.१७ ) **धारोष्णदुग्धगुणाः–जीर्णज्वरतृट्शूलप्रवाहिकाविबद्धानिलवर्चोनाशनम्** ( असंचि. २–४५–४६ ) **अक्वथितदुग्धगुणाः–अभिष्यन्दि प्रायशो गुरु च;** ( सुसू. ४५. ६१; ) **अतिपक्वदुग्धगुणाः–शीतं, गुरु, बृंहणं च,** ( सुसू. ४५.६३ ) **शृतदुग्धगुणाः–उदरिभ्य आस्थापने विरेचने, आहारविधिक्रियासु पाने च प्रयोज्यम्** ( सुचि. १४. १९; ) **शालिषष्टिकयोस्तथोपवासाध्वभाष्यस्त्रीव्यायामक्लान्तबालवृद्धेष्वनुपानार्थम् उपयोज्यम्** ( असंसू. १०. ४६; ) **अनिष्टगन्धमम्लं, विवर्णं, विरसं, सलवणं, विग्रथितं पयो न सेव्यम्** ( सुसू. ४५–६४ )

हिं.—दूध.
**म.—दूध.**
गु.—दूध,
बं.—दुध.
ता.—पाल्.

**दुग्धम्, जीर्णज्वरेषूपयुक्तम्** ( चचि. ३.२३९ ) **दुग्धं ज्वरक्षीणस्य वमनविरेचनभेषजापेक्षया मलहरणाय हितम्** ( चचि. ३.१७० ) **उपवासाध्वभाष्यस्त्रीमारुतातपकर्मक्लान्तानां पयोऽनुपानं पथ्यम्** ( चसू. २७.३२२ ) **शालिमुद्गादिभोजिनां युद्धसन्तापविषमद्यरुजासु च हितम्** ( सुसू. ४६.४२६ ) **प्रयोगापचिताङ्गानामुदरिणां सर्वधातुक्षयार्तानां सर्वप्रयोगाणामनु क्षीरं हितम्। तेन च दोषानुबन्धरक्षा बलस्थैर्यं च भवति** ( चचि. १३.१९३ ) **सदाहपिपासार्तानां सुखावहम्** ( सुउ. ३९.१४४ ) **गण्डूषकवलाद्यर्थमुपयुज्यते** ( असंसू. ३१.७ ) **पयोगुणाः–स्वादु सरं शीतं वातघ्नं च** ( असंसू. ७.२४१ ) **आमं पयोऽभिष्यन्दि गुरु, शृतं**

**लघ्वनभिष्यन्दि, अतिशृतं गरीयः, धारोष्णम-मृतोपमं च** ( अहृसू. ५.२८ )

**दूध**–आहार द्रव्य–**उत्पत्ति**–स्त्री गाय म्हैस इत्यादीं-पासून–दूध अनेक औषधींच्या रसाच्या सारभूत भागापासून उत्पन्न होते. दूध रस या धातूचा उपधातु होय. दुधाचे प्रकार ८. स्त्री गाय म्हैस शेळी मेंढी हत्तीण उंटीण घोडी यांचे, दुधाचे **सामान्य गुण**–बहुतकरून गोड पचनानंतरही गोड शीत स्निग्ध जड बुळबुळीत गुळगुळीत मृदु सारक धातूंची तृप्ति करणारे प्राणवर्धक जीवन चालवणाऱ्या सर्व द्रव्यात श्रेष्ठ. सर्व प्राण्यांना आत्मसात् होणारे, पौष्टिक, शरिराचे व मनाचे बलवर्धक, शुक्रधातूला बुद्धीला हितकर, श्रम व क्लमहर सर्वधातूंना पोषक, शुक्रवर्धक, तारुण्य कायम राखणारे, ओजाच्या गुणांशी समान असल्यामुळे ओजोवर्धक, बाल वृद्ध भुकेलेला संभोग व्यायाम वारा ऊन प्रवास व्याख्यान कष्ट यांनी थकलेल्याला अतिशय पथ्यकर, आयुष्य-वर्धक, दोषशामक, विशेषतः वातपित्तघ्न, सारक ( दोषशोधक ) अग्निदीपक, जखम भरून आणणारे, मळाच्या गाठी, अतिसार ग्रहणी मूळव्याध प्रवा-हिका, मूत्राचे प्रमाण कमी असणे, बस्तिदोष योनि-दोष गर्भाचा स्राव शुक्रदोष गुल्म उदर अम्लपित्त तहान श्वास खोकला क्षय हृदयदोष रक्तस्राव उरःक्षताने क्षीणता पांडुरोग दाह सूज भ्रम माज उन्माद मूर्च्छा विष मद्यदोष व जीर्णज्वरनाशक. भाताशी किंवा भात खाल्ल्यावर अनुपान म्हणून उत्तम. नस्य, लेप, वमन, रेचक, स्नेहन, बस्ति, अवगाह ( त्यात बसून शेक घेणे ) यात उपयुक्त. ज्वराने क्षीण असलेल्याला वामक रेचक या औषधांपेक्षा दूध हे मलहरणाकरिता चांगले. रेचका-दिकांनी क्षीण झालेल्यांना उदरी रोग्याचे सर्वधातु क्षीण झाले असतांना सर्व उपचारांनंतर दूध उप-युक्त. याने दोषांच्या पुन्हां आक्रमणापासून शरि-राचे रक्षण बळ व स्थैर्य उत्पन्न होते, व गुळण्या-करिता उपयुक्त. **धारोष्ण दूध** मलावरोध, वात-रोध. आवरक्त, शूल, तहान जीर्णज्वरनाशक. **कच्चे दूध**–जड व स्राव वाढविणारे. **अतिशय उकळलेले** व नंतर थंड केलेले दूध–गुरु पौष्टिक. **सामान्य उकळलेले**–उदरी रोग्याला बस्ति रेचक आहार पिणे यासाठी योग्य. **त्याज्य दूध**–वास, रंग, रस, बदललेले आंबट खारट व गाठाळ दूध उपयोगात आणू नये.

**–तुम्बी**–स्त्री., **वनस्पति० क्षीरतुम्बी** ( रा. ७.२३८ ) दुधी, दुध्याभोपळा.

**–दा**–स्त्री., **वनस्पति० चणिका** ( रा. परि. ८.६५ ) एक वनस्पती.

**–पान**–परिव० न., **क्षीरपानम्** ( सुचि. २४.९९ ) दूध पिणे.

**–फेनी**–स्त्री., **वनस्पति० कटुस्तिक्ता शीता रुच्या रसायनी विषनाशिनी व्रणापसारिणी च**
( रा. परि ५.३४ )

हिं.—दुधिया.
**म.—लघुदुधी.**
गु.—दुधेली मोटी.
ता.—दुधी.
फा.—निशाशत.

लहान दुधी. **गुण**–तिखट कडु थंड रुचि करणारी विषनाशक व्रण रुजविणारी व सर्वधातुपरिपोषक.

**–बीजा**– स्त्री., **वनस्पति० क्षीरतुम्बी** ( रा. ७.२३९ ) दुधी, दुध्याभोपळा.

**–वर्ग**– पु., **हस्तिनी, वडवा, गौः, उष्ट्री, गर्दभी, स्त्री, अजा, अविका इत्येतासां दुग्धानि; उदुम्बरः पिप्पलोऽर्को वटो रोध्रो दुग्धिका स्नुहीभेदा उत्त-मारणी चैतासां क्षीराणि** ( र. १०.८९ ) **अत्र हस्तिन्यादीनां प्राणिनो दुग्धवर्गः, उदुम्बरादीनां तु वानस्पतिको दुग्धवर्गो ज्ञेयः ।**

१ **प्राणिज दूधवर्ग**–गाय घोडी हत्तीण उंटीण गाढवी शेळी मेंढी व स्त्री यांची दुधे २ **वनस्पतिज दूधवर्ग** उंबर पिंपळ वड रुई रोध्र दुधी त्रिधारी निवडुंग अरणी यांची दुधे. ( चीक )

**–हरिणी नाडी**–स्त्री., **दुग्धवहा नाडी**
( सुचि. १७.४७ )
दूध वाहणारी नाडी.

**दुग्धनिका**–स्त्री., **वनस्पति० अपामार्गः** ( रा. ४.३९० ) आघाडा.

**दुग्धिका**–स्त्री., ( र. १४:८८–८९ ) **क्षीरिणी** ( र. १४.३७.४६ ) दुधी.

**दुच्छाय**–वि., **मलिनकान्तिः** ( अहृसू. ११.४० ) ज्याची कांति मळकट तो, कांतिहीन.

**दुटि**–पु', **जलजप्राणि०** ( का. खिल अ. २४.५३ ) पाण्यातला प्राणी.

**दुद्रुम**-पु., वनस्पति० पलाण्डुः ( ध. ४.७१ ) कांदा.

**दुन्दुभि**-पु., निःस्वातः ( सुसू. २९.३० ) नगारा.
प्रतुदपक्षि० (चसू. २७.५१) भक्ष्य टोचून खाणारा.
असुर० स्कन्देनासौ निहतः ( काचि. बालग्रह )
असुर, बालग्रह. कार्तिकेयाने याचा वध केला.
आग्नेयकीट० ( असंउ. ४३ ) दाहक किडा.

**-स्वनीय**-वि., अध्याय० ( सुक. ६.१ )
अध्यायाचे नाव, नगारा व इतर आवाज या संबंधी विषोपचार विषयक माहिती या अध्यायात आहे.

**दुन्दुभिक**-पु., सविषकीट० आग्नेयत्वात् स पित्तज-रोगान् करोति ( सुक ८.१० )
विषारी किडा, पित्तज रोग करतो.

**दुरभिग्रह**-पु., वनस्पति० अपामार्गः ( ध. १.२६१ )
आघाडा.

**( दुरभिग्रहा )**-स्त्री., वनस्पति० धन्वयासः ( रा. ३.२० ) धमासा.
कपिकच्छूः ( ध. १.१५१ ) खाजकुहिली.

**दुराकर्ष**-वि., आक्रष्टुमशक्यम् ( अहसू. २८.२६ )
ओढण्यास कठीण, ओढण्यास अशक्य.

**दुराचर**-वि., दुःखेनोपचर्यते ( सुउ. २०.६ )
उपचार करण्याला त्रासदायक.

**दुरात्मन्**-वि., दुःखितान्तःकरणः ( सुउ. ३९.९३ )
ज्याचे अंतःकरण दुःखित आहे असा, दुःखी.
अजितेन्द्रियः ( सुउ. ४०.२१ )
इंद्रिये व मनावर ताबा नसणारा.

**दुराधर्ष**-पु., वनस्पति० सर्षपः ( रा. १६.६८ )
मोहरी.

**( दुराधर्षा )**-स्त्री., वनस्पति० कुटुम्बिनी ( रा. परि. ५.२१ )
पाण्यात होणारी दुधाळ वनस्पती.

**दुरारुह**-पु., वनस्पति० बिल्वः ( रा. ११.१३५ ) बेल.
नारिकेलः ( रा. ११.१०५ ) नारळ.
तालः ( ध. ५.६८ ) ताड.

**( दुरारुहा )**-स्त्री., वनस्पति० खर्जूरः ( रा. ११.६५ )
खजूरी.

**दुरारोहा**-स्त्री., वनस्पति० श्रीवल्ली ( रापरि. ८.३३ )
आंबट व तिखट फळांची काटेरी वेल.
खर्जूरः ( ध. ५.५३ ) खजूर.

**दुरालभा**-स्त्री., वनस्पति० धन्वयासः ( चसू. ४.१४ )
धमासा,

**दुरालभासव**-पु., आसुत० ग्रहणीपाण्डुरोगार्शःप्रभृति-रोगेषु शस्तः ( चचि. १५.१५२-१५५ )
धमाशाचे आसव. ग्रहणी पांडुरोग मूळव्याध इत्यादी रोगात उपयोगी.

**दुरालम्भा**-स्त्री., वनस्पति० धन्वयासः ( चचि. १८. १२७ ) धमासा.

**दुरितशमनी**-स्त्री., वनस्पति० शमी ( रा. ८.१५२ )
शमी.

**दुर्ग**-वि., गम्भीरम् ( चसू. २४.४५ ) खोल.
पु., निर्यास० गुग्गुलुः ( ध. ३.१२७ ) गुग्गूळ.

**दुर्गन्ध**-वि., कुत्सितगन्धम् ( सुसू. ४५.१९८ ) तस्य कर्माणि हृल्लासोऽरुचिकरत्वं च ( सुसू. ४६.५२२ )
वाईट वास, घाण वास. त्याचा परिणाम-तोंडाला थुंकी येणे व अरुचि होणे.

**( दुर्गन्धा )**-स्त्री., वनस्पति० बाकुची ( ध. १.१६६ )
बावची.

**दुर्गाध**-वि., अगाधम् ( सुउ. १.८ )
अगाध. फार खोल.

**दुर्गाह्लाद**-पु., निर्यास० गुग्गूळ.
भूमिजगुग्गुलुः ( रा. १२.१८८ ) भूमिजगुग्गूळ.

**दुर्ग्रह**-पु., वनस्पति० अपामार्गः ( ध. १.२६० )
आघाडा.

**दुर्ग्रहोपसर्ग**-पु., दुष्टानां स्कंदादिबालग्रहाणां संसर्गः ( सुशा. १०.४६ )
दुष्ट अशा स्कंद इत्यादी बालग्रहांचा उपसर्ग-पीडा.

**दुर्जरा**-स्त्री., वनस्पति० ज्योतिष्मती ( ध. १.२६७ )
मालकांगोणी.

**दुर्दर्शन**-वि., दुःखेन दृश्यते ( सुनि. २.१५ )
कष्टाने दुःखाने ज्याचे दर्शन होते.

**दुर्दिन**-न., मेघाच्छादितं दिनम् ( अहसू. ३.४६ )
ढगाळ दिवस. ढगाने सर्व आकाश आच्छादिलेला दिवस.

**दुर्धर**-पु., वनस्पति० ऋषभः ( ध. १.१२५ )
अष्टवर्गापैकी एक.

**( दुर्धरा )**-स्त्री., रेवतीग्रह० ( का. रेवतीकल्प. ३७.३८ )
रेवती बालग्रह.

**दुर्धर्षा**-स्त्री., वनस्पति० कन्थारी ( रा. परि. ८.२० )
तीक्ष्ण वास व तीक्ष्ण काटे असणारी वनस्पती.
जम्बूः ( रा. परि, ५.२४ ) जांभूळ.

**दुर्नामन्**–पु., रोग० अर्शस् ( र. २१.८९ ) मूळव्याध.
**दुर्नामारि**–पु., वनस्पति० सूरणः ( ध. परि. ४.६ )
सुरण.
**दुर्निबन्धन**–न., दुर्बन्धनम्, अनुचितबन्धनम्
( सुनि. १५.१४ )
अनुचित बंधन, दुःखद बंधन.
**दुर्न्यास**–पु., दुःस्थापनम् ( सुनि. १५.१४ )
नीट न ठेवणे. अव्यवस्थित ठेवणे. जागेवर न ठेवणे.
**दुर्बल**–वि., प्राणहीनः, क्षीणः, ( सुसू. ११.९ ) मन्दः
( चचि. १५.५१.५२ )
दुबळा. क्षीण. मंद.
**दुर्भग**–वि., अमनोरमाकारः ( सुशा. ४.६४ )
वेड्यावाकड्या आकाराचा. मनाला न आवडणाऱ्या आकाराचा, कुरूप, दुर्भागी, कमनशिबी.
**दुर्भगक**–न., रोग० भगन्दरः ( र. २.१० ) भगंदर.
**दुर्मनस्** वि., गतोत्साहः ( अहृसू. ११.४० )
दुःखी मनाचा. निरुत्साही, वाईट मनाचा.
**दुर्मरा**–स्त्री., वनस्पति० दूर्वाभेदः श्वेतदूर्वा
( ध. ४.१४४ ) द्र० ' दूर्वा '
पांढरी दूर्वा.
शतावरी ( रा. ४.४४० ) शतावरी.
**दुर्मेधस्त्व**–वि., दुष्टबुद्धित्वं, तामसगुणः (सुशा. १.१८)
दुष्टबुद्धित्व. दुष्टावा. तामसी गुण.
**दुर्मेल**–वि., परस्परं न संमील्यते यथा कठिनं लोहं मृदु च स्वर्णं परस्परं न संमील्येते ( र. २.८५ )
परस्पर न मिसळणारे, जसे कठीण लोखंड व मऊ सोने ही एकमेकांशी मिसळणे कठीण आहे.
**दुर्मोहा**–स्त्री., वनस्पति० काकादनी ( ध. ४.२७ )
कावळीचा एक प्रकार.
**दुर्योग**–पु., दुष्प्रयोगो, मिथ्याप्रयोगः
( सुचि. ३४.२२ ) चुकीचा प्रयोग.
**दुर्लभ**–पु., वनस्पति० कर्चूरम् ( ध. ३.९४ ) कचोरा.
**( दुर्लभा )**–स्त्री., वनस्पति० धन्वयासः ( रा. ३.२० )
धमासा.
लक्ष्मणा ( ध. १.९७ ) पांढरी रिंगणी.
**–हेतुक**–वि., दुर्लभो दुर्ग्रहो हेतुः कारणं यस्य सः
( असंसू. ७.२६२ )
ज्याचा हेतु दुर्लभ आहे असा.
**दुर्वर्ण**–न., वनस्पति० एलावालुकम् ( ध. ३.७६ )
सुगंधी खर्बूज.

**दुर्वान्त**–वि., असम्यग्वामितः ( सुचि. ९.४२ )
वांतीचे औषध ज्याला चांगले लागू झाले नाही असा. मोकळ्या वांत्या न झालेला.
**दुर्विधेया**–स्त्री., वनस्पति० सठी ( ध. १.६२ ) कचोरा.
**दुर्हृद्**–वि., दुष्टं हृदयं यस्य सः, दुर्बुद्धिः ( कासू. १९ )
दुष्ट हृदयाचा. दुष्ट. दुर्बुद्धि असलेला. दुष्ट बुद्धीचा.
**दुश्चक्रम**–पु., वनस्पति० गोक्षुरः (रा. ३.१३०) गोखरू.
**दुश्चिकित्स्य**–वि., असाध्यः दुःखेन चिकित्सनीयः
( सुसू. ३३.५ )
असाध्य. उपचाराला त्रासदायक.
**दुश्छर्दन**–वि., यो दुःखेन छर्दयति सः ( च. सि. २.८ )
ज्याला कष्टाने ओकारी होते तो.
**दुष्कर**–वि., दुश्चिकित्स्यम् ( सुचि. ८.११ )
उपचार करण्याला त्रासदायक.
**दुष्कुल**–पु., वनस्पति० चोरकः ( रा. १२.१२८ )
चोरओवा.
**दुष्कृत**–न., असत् कृतम् ( अहृसू. १२.३५ )
खोटे केलेले, पाप. दुष्कृत्य.
**दुष्ट**–वि., दोषकारकम् ( चचि. १२.५ ) विषादिभिर्दोषकरम् ( सुसू. ४६.४७६ )
दोषकारक, विषादिकांनी दोषकर.
**–क्षीरा**–वि., दुष्टं क्षीरं यस्याः सा ( चशा. ८.५६ )
दूषित दुधाची. जिचे दूध दोषकारक आहे अशी.
**–ग्रह**–पु., स्कन्दापस्मारादिकग्रहः ( सुसू. २३.१६ )
स्कंदापस्मार इ० ग्रह.
**–पीनस**–पु., नासारोग० पीनसः अप्रतिकुर्वतः नरस्य प्रतिश्यायोत्तरं पीनसस्य दुष्टत्वमत्रानुसन्धेयम्
( सुसू. २४.१७ )
जुने व त्रासदायक पडसे; फार दुष्टीचे पडसे. पीनस.
**–प्रतिश्याय**–पु., नासारोग० प्रतिश्यायः अत्रापि दुष्टपीनसशब्दगदुष्टविशेषणस्य तात्पर्यमतिदेश्यम्
( सुउ. २४.१५–१६ ) त्रासदायक पडसे.
**–मद्य**–न., विकृतमद्यम्, नवम्, व्यापन्नम्, अकालजम् ( सुउ. ४०.४ )
बिघडलेले मद्य. नवे मद्य. अकाली केलेले मद्य.
**–यान**–न., अयोग्यं वाहनम् ( अहृसू. २.३५ )
अयोग्य वाहन.
**–योनि**–वि., योनिरोगपीडिता स्त्री
( र. २२.३७–४० ) योनिरोगाने पीडलेली.
**–रक्त**–न., दूषितरक्तम् ( अहृसू. २७.२–५ )
दुष्ट रक्त. दूषित रक्त,

**–रक्तापगम**–पु., दूषितरक्तस्य निस्सरणम् (असंसू. ३५.७)
दूषित रक्त काढणे. स्राव करणे.

**–रक्तापगमन**–न., दूषितरक्तस्य निस्सरणम् (अहृसू. २६.४७)
दूषित रक्त स्रवणे.

**–व्रण**–पु., दूषितो व्रणः (सुसू. २२.७)
बिघडलेला व्रण. दूषित जखम.

**–व्रणविधि**–पु., अशुद्धव्रणस्य चिकित्सितम् (सुचि. २.९४) अशुद्ध व्रणाचे उपचार.

**–शोणित**–न., दूषितरक्तम् (चनि. १.३०)
दूषित रक्त.

**दुष्टात्मन्**–वि., दुष्टो हि आत्मा स्वभावो यस्य सः (सुउ. ६०.९) दुष्ट स्वभावाचा.

**दुष्टादुष्ट**–वि., दुष्टश्चायमदुष्टश्चेति तेन पिता हि पुत्रस्य दुष्टोऽप्यदुष्टत्वाद् आप्त एव भवति (चक्र. चवि. ४.४)
दुष्ट आणि अदुष्ट. पिता पुत्राच्या दृष्टीने दुष्ट असला तरी तो पिता म्हणून अदुष्ट असल्याने पुत्राचा तो आप्तच होतो.

**दुष्टाम्बु**–न., दुष्टं जलम् (सुउ. ४०.४) बिघडलेले पाणी.

**दुष्टास्र**–न., दुष्टरक्तम् (असंसू. ३६.१७) दुष्ट रक्त.

**दुष्टास्रसंभव**–पु., दुष्टरक्तसंभवः (असंसू. ७.२५१)
दुष्ट रक्तापासून उत्पन्न झालेले.

**दुष्टि**–स्त्री., दूषणम् (चनि. ५.७) दूषण.

**दुष्टेक्षित**–न., दुष्टमीक्षितम्, 'स्वभावनष्टे शुष्के वा दुष्टे साध्वीक्षिते हितम् (कासंसू. १९)
दुष्ट नजर. नजर लागणे.

**दुष्पत्र**–पु., वनस्पति० चोरकः (ध. ३.७१) चोरओवा.

**दुष्प्रजाता**–वि., दुःखेन प्रसूता, यस्याः प्रसवः कष्टेन जातः सा (काचि. दुष्प्रजा. ३)
दुःखाने–कष्टाने प्रसूत होणारी किंवा झालेली.

**दुष्प्रधर्षा**–स्त्री., वनस्पति० खर्जूरः (ध. ५.५३) खजूर.
धन्वयासः (रा. ३.२०) धमासा.

**दुष्प्रधर्षिणी**–स्त्री., वनस्पति० कण्टकारी (ध. १.९५)
रिंगणी,

**दुष्प्रवेशा**–स्त्री., वनस्पति० कन्थारी (रापरि. ८.२०)
तीक्ष्ण वास व तीक्ष्ण काटे असणारी वनस्पती.

**दुष्प्रसू**–वि., दुःखेन प्रसूयते इति (सुउ. ३८.१३)
कष्टाने–दुःखाने प्रसूत होणारी,

**दुःस्पर्श**–पु., वनस्पति० लताकरञ्जः (रापरि. ८.२४)
सागरगोटा.
**बदरम्, भूबदरी** (रा. ११.१६४) बोर, भुईबोर.

**(दुःस्पर्शा)**– वनस्पति० धन्वयासः (सुउ. ५५.२५)
धमासा.
**खवल्ली** (रापरि. ३.१९) आकाशवेल.

**दुस्सह**–पु., बालोपग्रह० (का. द्विव्रणीयचि.)
एक बालग्रह.

**(दुस्सहा)**–स्त्री., वनस्पति० जम्बूः (रापरि. ५.२४)
जांभूळ.

**दुहितृकाम**–वि., अपत्यत्वेन कन्यामभिलषन् (असंशा. १)
मुलगी व्हावी अशी इच्छा असणारी.

**दूत**–पु., स्त्रीपुरुषादिर्य आतुरेण प्रेष्यते स दूतः (सुसू. २९.३) **दूतस्य शुभलक्षणानि शुक्लवासाः, शुचिः प्रियदर्शनः स्मृतिमान्विधिकालज्ञोऽलंकृतो मङ्गलवान् स्वस्थः प्राङ्मुखमासीन इति** (सुसू. २९ २३–२६) **तस्याऽशुभलक्षणानि–रौद्रस्वरूप उद्विग्नो न्यूनाधिकाङ्गो विकृत आर्द्रजीर्णापसव्यैकमलिनवस्त्रधारी** (सुसू. २९.१५.२३)
रोग्याने वैद्याला बोलावण्यास पाठविलेला पुरुष वा स्त्री. **शुभ लक्षणे**–पांढरे कपडे घातलेला शुचि दिसण्यात आवडणारा स्मृतिमान् काळवेळ जाणणारा व्यवहारज्ञ योग्य अलंकार घातलेला मंगलवस्तुयुक्त निरोगी, वैद्याकडे आल्यावर पूर्वेकडे तोंड करून किंवा वैद्याचे समोर बसलेला. **अशुभ लक्षणे**–रागीट चेहेऱ्याचा उद्विग्न कमी किंवा अधिक अवयव असलेला रोगी ओले फाटलेले मळकट एकच वस्त्र व तेही उलटे घातलेले असा दूत.

**दूतादिविज्ञान**–न., अध्याय० (असंशा. १२.१)
अध्यायाचे नाव–दूताबद्दलची माहिती यात आहे.

**दूताधिकार**–पु., दूतानां शुभाशुभादित्वस्य विचारो यत्र कृतः, सोऽधिकारः (चद. १.३)
दूताचा अधिकार, दूताची शुभाशुभ लक्षणे जेथे सांगितली आहेत तो.

**दूयन**–न., लक्षण० दुःखमङ्गमर्दः (चसू. १७.५४)
**अतिवेदना** (सुउ.४१.२५)
दुःख, अंग दुखणे, अतिवेदना.

**दूरजनान्तनिलय**–वि., (परिव०) दूरे ग्रामान्निलयो गृहं यस्य सः (सुसू. ४६.९१)
ज्याचे घर गांवापासून दूर आहे असा,

**दूरपानीयगोचर**–वि., ( परिव० ) पानीयाद्दूरे निवासी ( मृगः ) ( सुसू. ४६.९ )
पाण्यापासून दूर रहाणारे ( मृग )

**दूरमूल**–पु., वनस्पति० मुञ्जः ( रा. ८.२०५ )
मुंजगवत, मोळ.
धन्वयासः ( ध. १.२२ ) धमासा.

**दूरेक्षण**–न., दूरस्थितस्य वस्तुनः प्रेक्षणं नेत्रविकारकारणानामेकतममिदम् ( सुउ. १.२६ )
दूर असलेली वस्तु दिसणे. दूरचे दिसणे–पाहणे.

**दूर्वा**–स्त्री., तृण० ( चसू. ३.२७ ) साधारणगुणाः—कषाया, मधुरा, शीता, रुच्या, तृप्तिदा, कफपित्तघ्नी, तृष्णाच्छर्दिदाहमूर्च्छाग्रहभूतनाशिनी, श्रमनाशिनी, रक्तपित्तापहा (रा. ८.२३६) त्वगामयघ्नी ( र. १७.१२२ ) विसर्पनाशिनी ( र. १३.१३ ) दूर्वाभेदाः—नीलदूर्वा—मधुरा, तिक्ता, शीता, रोचनी, कफवातघ्नी, रक्तपित्तातिसारज्वरघ्नी; श्वेतदूर्वा—मधुरा, अतिशीता, रुच्या, पित्तघ्नी, छर्दिदाहतृष्णाकासामातिसारघ्नी, गण्डदूर्वा–मधुरा, शीता, पित्तवातघ्नी, ज्वरभ्रमतृष्णाश्रमापहा; वल्लीदूर्वा—मधुरा तिक्ता शीता पित्तकफघ्नी, तृष्णाच्छर्दिनाशिनी
( ध. ४.१४३–४७; रा. ८.२२६–३६ )
हिं.—दूब.
**म.—हरळी.**
गु.—नीली ध्रो.
बं.—दूर्वा.
ता.—अरुकु.
दूर्वा–प्रकार चार. १ हिरवी २ पांढरी ३ गांठी ४ वेल, **साधारण गुण**–गोड तुरट थंड रुचिकर तृप्ति उत्पन्न करणारी थकवानाशक कफपित्तनाशक तहान ओकारी धावरे त्वचारोग दाह मूर्च्छा ग्रहबाधा व रक्तस्रावनाशक.
**हिरवी**–कडु कफवातघ्न अतिसार ज्वरनाशक. **पांढरी**–अतिथंड पित्तनाशक खोकला आमातिसारनाशक. **गण्ड**–पित्तवातनाशक ज्वर भ्रमनाशक **वेल**–कडु. सामान्य गुण सर्वांत आहेत.
वनस्पति० सठी ( ध. ६.८७ ) कचोरा.

**–सोम**–पु., सोम० ( सुचि. २९.५ ) सोमप्रकार.

**दूर्वानलवेत्रासव**–पु., आसुत० ( सुसू. ४६.४३३ )
दूर्वा चित्रक वेत यांचे आसव.

**दूषक**–पु., धान्य० शालिवर्गीयाणामेकतमः द्र० 'शालि' ( सुसू. ४६.४ )
साळीपैकी एक.

**( दूषिका )**–स्त्री., नेत्रमलम् ( सुउ. ६.१६ )
डोळ्याचा मळ. चिपडे.

**दूषण**–न., दोषकारणम् ( चवि. ६.१० ) दोषकारण.

**दूषणात्मन्**–वि., दूषणस्वभावः ( अहसू. ७.५१ )
दुष्टि करण्याचा स्वभाव.

**दूषीविष**–न., विष० कालान्तरप्रकोपि विषम्
( चक. चसू. २१.४५ ) ( चचि. २३.३१ )
यद्यपि न प्राणहरं तथापि बहुदोषकरम्
( चचि. २३.१४० )
यस्माद्देशकालान्नदिवास्वप्नैरभीक्ष्णशो दूषितं विषं रसादिधातून् दूषयते तस्माद्दूषीविषं स्मृतम् ,विषघ्नौषधिभिर्हतं वा दावाग्निवातातपशोषितं वा स्वभावतो गुणविप्रहीनं वा विषं दूषीविषतामुपैति । तस्य पूर्वरूपाणि–निद्रा, गुरुत्वं, विजृम्भणं, विश्लेषो रोमहर्षोऽङ्गमर्दः. तल्लक्षणानि–दूषीविषेणार्दितो भिन्नपुरीषवर्णो विगन्धवैरस्यमुखः, पिपासामूर्च्छावमीगद्गदवाणीविषण्णतादूष्योदरलिङ्गो भवति, प्रायेण दूषीविषं तदर्दिते नरे अन्नमदमविपाकमरोचकं, मण्डलकोठमोहान्धातुक्षयं, पादकरास्यशोफं दकोदरं, छर्दिमतिसारं करोति । त्रैवर्ण्यमूर्च्छाविषमज्वरान् प्रवृद्धां प्रबलां तृषां वा कुर्यात् । उन्मादमानाहश्च जनयेत् । शुक्रं क्षपयेत् । गाद्गद्यं कुष्ठं वा जनयेत् ( सुक. २.२५–३३ ) उपद्रवाः ज्वरदाहादयः, चिकित्सा सम्यक् शुद्धं च दूषीविषार्तं दूषीविषार्यगदं पाययेत् ( सुक. २.५०,५३,५४ )
शरिरात गेल्यानंतर लगेच प्रकुपित न होता काही काळाने प्रकुपित होणारे विष. ते जरी प्राणहर नसले तरी फार दोष करते. अनुकूल देश काल अन्न दिवसाची झोप यांनी ते रसादि धातूंना वारंवार दूषित करते म्हणून त्याला दूषीविष म्हणतात. विषघ्न औषधांनी मारले, रानातील अग्नि वारा ऊन यांनी शुष्क झाले किंवा आपोआप हीनवीर्य झाले की विष हेच दूषीविष होते. ते विकार करण्यापूर्वी होणारी. **पूर्वरूपे**–झोप जडपणा जांभया आंग गळणे अंगावर रोमांच उभे रहाणे अंग दुखणे. **लक्षणे**–मळ पातळ वर्णात बदल तोंडाला घाण व रस न कळणे प्रबळ तहान ओकारी मूर्च्छा अडखळत बोलणे

व दूष्योदर ही होतात. जेवल्यावर अन्न लागते, पचन होत नाही, चव नाहीशी होते. अंगावर चकंदळे मंडळे हातापायावर सूज जलोदर ओकारी अतिसार विषमज्वर उन्माद पोटफुगी कुष्ठ होते. धातुक्षय शुक्रक्षय विचारांचा गोंधळ होतो. **उपद्रव**–ताप व दाह. **उपचार**–प्रथम शुद्धी करून नंतर दूषीविषारी इत्यादी अगदे पाजावीत.

**दूषीविषारि**–पु., **योग० अयं दूषीविषे विषान्तरेष्वपि दध्ना मधुना वा संयुतः पेयः** ( सुक. १.४३ )
दूषीविषात किंवा अन्य विषात दही किंवा मध याबरोबर द्यावा.

**दूष्य**–वि., **यद्दोषैर्दुष्टं भवति रसादिकं मलादिकं च तत्** ( चवि. ८.१०१ )
दोषांनी जो दुष्ट होतो तो दूष्य. रसादि धातु किंवा मल इत्यादी.

**दूष्युदर**–न., **रोग० उदरभेदः** ( सुनि. ७.१३–१४ )
**द्र० 'उदर'**
उदराचा प्रकार. त्रिदोषज उदर.

**दूष्योदर**–न., **रोग० सान्निपातिकमुदरम्** (चसि. २.१५)
सन्निपातज उदर.

**दृढ**–वि., **अजर्जरम्** ( सुचि. ३५.१२ )
बळकट, खिळखिळे न होणारे, लवकर खराब न होणारे.
पु., **वनस्पति० लकुचः** ( रा. परि. ९.४४ )
बळकट व तुरट सालीचा बळकट वृक्ष;
न., **वनस्पति० एलावालुकम्** ( ध. ३.७६ )
सुगंधी खरबूज.
**खनिज० हीरकम्** ( ध. ६.५६ ) हिरा, हीरक.
**लौहम्** ( र. २३.४० ) लोह.

**–काण्ड**–पु., **वनस्पति० कत्तृणम्** ( रा. ८.१०८ )
रोहिसगवत.
**वंशः** ( रा. ७.२१५ )
बांबू, कळक, टोकर.

**–( काण्ड )**–स्त्री., **वनस्पति० वत्सादनी** ( रा. परि. ३.३३ )
एक सोमवल्ली. लांब व बळकट कांडाची लांब वेल.

**–क्षुरा**–स्त्री., **वनस्पति० बल्वजा** ( रा. परि. ८.४० )
मोळ, लव्हाळा.

**–ग्रन्थि**–पु., **वनस्पति० वंशः** ( रा. ७.२१५ )
बांबु, कळक, टोकर,

**–च्छद**–पु., **वनस्पति० तालः** ( रा. ९.९३ ) ताड.
न., **वनस्पति० कत्तृणम्** ( रा. ८.१०८ )
रोहिसगवत.

**–तरु**– पु., **वनस्पति० धवः** ( रा. परि. ९.८ )
धावडा.

**–ता**–स्त्री., **स्थैर्यम्** ( चवि. ८.५ ) स्थिरत्व, स्थैर्य.
**लक्षण० काठिन्यम्** ( चसू. १३.४५ )
कठिणपणा. काठिण्य.

**–तृण**–पु., **वनस्पति० मुञ्जः** ( रा. ८.२०५ )
मुंजा, मोळ.

**–त्वच्**–पु., **वनस्पति० यावनालः** ( रा. परि. ८.३८ ).
दर्भाची एक जात.

**–नील**–पु., **वनस्पति० नारिकेलः** ( रा. ११.१०४ )
नारळ.

**–पत्र**–पु., **वनस्पति० वंशः** ( रा. परि. ७.२१५ )
बांबू, कळक, टोकर.

**–( पत्री )**–स्त्री., **वनस्पति० बल्वजा** (रा. परि. ८.४० )
मोळ, लव्हाळा.

**–पादा**–स्त्री., **वनस्पति० शङ्खिनी** ( ध. १.२५६ )
शंखिनी, सांखवेल.

**–पादी**–स्त्री., **वनस्पति० भूधात्री** ( रा. ५,१४४ )
भुईआवळी.

**–प्ररोह**–पु., **वनस्पति० प्लक्षः** ( रा. ११.१२५ )
पिंपरी, लाखी पिंपरी.

**–फल**–पु., **वनस्पति० नारिकेलः** ( ध. ५.७४ )
नारळ.

**–फलस्थिति**–पु., **वनस्पति० नारिकेलः** ( रा. ११.१०५ ) नारळ.

**–बल**–पु., **ऋषि० चरकसंस्कृतस्याग्निवेशतन्त्रस्य सप्तदशचिकित्साध्यायैस्तथा कल्पसिद्धिस्थानाभ्यां पूरणमकरोत् । यक्ष्मचिकित्सितान्तानष्टावध्यायान् तथाऽर्शोऽतिसारविसर्पद्विव्रणीयमदात्ययोक्तान् विहाय सप्तदशाध्याया ज्ञेया अवशिष्टाः** ( चक्र. चचि. ३०.२९० )
अग्निवेशसंहितेवर चरकांनी संस्कार केला त्यात ज्यांनी सतरा चिकित्सेचे अध्याय व कल्प आणि सिद्धिस्थान यांची भर घातली ते दृढबल. यक्ष्मचिकित्सेपर्यंतचे आठ अध्याय तसेच अर्श अतिसार विसर्प द्विव्रणीय मदात्यय हे अध्याय सोडून बाकीचे सतरा अध्याय दृढबलाचे होत.

**-बीज**-पु., वनस्पति० **बर्बुरः** ( रा. परि. ८.१३ )
बाभूळ.
**चक्रमर्दः** ( रा. ४.९ ) टाकळा, तरोटा.
**बदरम्** ( रा. ११.१५७ ) बोर.
**-मूल**-न., वनस्पति० **मन्थानकः** (रा. परि. ८.५५)
गवतांचा राजा.
गाईला आवडणारे व त्यांचे दूध वाढवणारे मधुर गवत.
**-मूल**-पु., वनस्पति० **मुञ्जः** ( रा. ८.२०५ ) मुंजा.
**-लता**-स्त्री., वनस्पति० ( रा. परि. ३.३३ )
लांब व बळकट दांड्याची लांब सोमवल्ली.
**-वल्क**-पु., वनस्पति० **पूगः** ( रा. ११.७१ )
सुपारी.
पु., **वनस्पति० लकुच** (रा. परि. ९.४४ )
एक वनस्पती. ओटी, क्षुद्र फणस.
**-स्कन्ध**-पु., वनस्पति० **राजादनः** ( ध. ५.९१ )
खिरणी, चार.
**-( वल्का )**-स्त्री., वनस्पति० **अम्बष्ठा** ( ध. ३.११६ रा. ४.१७० )
फाटलेल्या सुगंधी पानांची बळकट सालीची वनस्पती; अनेक रंगी फुलांची वनस्पती.

**दृढाग्नि**-पु., **बलवानग्निः** ( चचि. ३.१७२ )
बळकट पाचकाग्नि.

**दृढेन्द्रिय**-वि., **दृढानि स्वकार्यकरणक्षमाणीन्द्रियाणि यस्य सः** ( सुचि. ३१.५६ )
बलवान इंद्रिये असणारा. न थकता आपापली कार्ये थोडी अधिक ही करणारी इंद्रिये ज्याची आहेत असा.

**दृढोत्थान**-पु., **दृढारम्भः** ( सुशा. ४.८६ )
बळकट आरंभ. जोराने आरंभ.

**दृति**-स्त्री., **चर्मपुटकम्** ( सुसू. ९.४ ) **पानीयपूर्णखल्ली** ( सुचि. १५.१२ )
पखाल. विहिरीतून पाणी काढण्याकरिता चामड्याची केलेली गोणी.

**दृप्त**-वि., **मदोन्मत्तः** ( असंसू. ४.१० )
मदोन्मत्त, उन्मत्त, माजलेला, गर्विष्ठ.

**दृश्**-स्त्री., **दृष्टिः** ( अहृसू. १२.२ ) दृष्टि, नजर.

**( दृक् )-प्रद**-न., खनिज० **अञ्जनम्** ( रा. १३.२१४ )
अंजन, सुरमा.
**-प्रसादा**-स्त्री., वनस्पति० **कुलत्था** ( ध. ३.१५६ )
रानकुळीथ.

**( दृग् )-घ्न**-वि., **दृष्टिनाशकम्** ( अहृसू. ६.३४ )
दृष्टिनाशक.
**-विपर्यय**-पु., **शास्त्रदृष्टिवैपरीत्यं नास्तिकत्वादि** (अरु).
**आप्तवाक्येष्वप्रमाणबुद्धिः** ( हे. अहृसू. २.२२ )
विपरीत शास्त्रदृष्टि असणे. नास्तिकत्व. आप्तवाक्य मान्य नसणारी बुद्धि.

**( दृङ् ) नाश**-पु., लक्षण० **दृष्टिनाशः** (अहृसू. २३.५)
दृष्टीचा नाश. अंधत्व.

**दृश्य**-वि., **प्रत्यक्षोपलब्धिविषयम्** ( चशा. ७.१३ )
प्रत्यक्षाला उपलब्ध होणारा विषय. डोळ्याला दिसणारे ते.

**दृषद्**-स्त्री., **शिला** ( सुचि. २७.८ )
**मांसादिपेषणार्थं कृतः पाषाणविशेषः** ( सुसू. ४६. ३६४ ) **घर्षणार्थं पाषाणखण्डविशेषः** ( कासू. लेहाध्याय )
पदार्थ वाटण्यासाठी उपयोगी, चपटा दगड, पाटा, शिळा इ.
**वनस्पति० पाषाणभेदः** ( ध. १.१५७) पाषाणभेद.
**-( दृषत् ) पत्री**-स्त्री., वनस्पति० **सिगृडी** ( रापरि. ४.३१ )
फुलांचे गुच्छ असलेली वनस्पती.
**-सार**-न., खनिज० **मुण्डलोहम्** ( रा. १३.२९ )
मुंडलोह. एक लोखंड.

**दृष्ट**-वि., **दर्शनविषयीभूतम्** ( चसू. २५.४० )
दिसलेले, पाहिलेले.
**-कर्मता**-स्त्री., **बहुशः कर्मानुभवः** (चसू. २५.४०)
अनेक वेळा पाहिलेले असणे. अनेक वेळा कर्मांचा अनुभव घेतलेला.
**-कर्मन्**-वि., **अभ्यस्तकर्मा** ( अहृसू. १.२८ ) **छेदादौ स्नेहादौ च कुशलः** ( सुसू. ३४.१९ ) **बहुशश्चिकित्सितरोगो वैद्यः** ( सुसू. १०.३ )
कर्मांचा अभ्यास केलेला, पुष्कळ रोगी पाहिलेला, अनुभवी. स्नेहन वमन रेचन ही कर्मे व छेदनादि शस्त्रकर्मे यात कुशल. अनेक रोग्यांची चिकित्सा केलेला वैद्य. अनुभवी वैद्य.
**-रिष्ट**-वि., **दृष्टं रिष्टं नाम मरणसूचकं लक्षणं यस्मिन् तत्** ( असंशा. १०.३१ )
ज्या रोग्यात मरणसूचक लक्षणे दिसतात तो.

**दृष्टान्त**-वि., पु., **यस्मिन्नर्थे मूर्खाणां लौकिकानां पण्डितानां च योऽर्थोऽविवादसिद्धः स दृष्टान्तो भवति। विदुषां बुद्धिसाम्यं—यथाऽऽदित्यः प्रकाशकस्तथैव सांख्यज्ञानं प्रकाशकम्** ( चवि. ८.३४ )

**न्याये पञ्चावयववाक्ये उदाहरणम्–यथा नित्यः पुरुषः, अकृतकत्वादिति हेतौ, अकृतकमाकाशं तच्च नित्यमिति दृष्टान्तः**

जे उदाहरण अज्ञानी व विद्वान या दोघांना समजते मान्य असते तो दृष्टांत. जसा सूर्य प्रकाशक तसे सांख्यशास्त्र प्रकाशक आहे, यात सूर्य प्रकाशक आहे हे अज्ञानी व विद्वान या दोहोंना मान्य आहे. हा दृष्टांत होय. तसेच पुरुष हा नित्य आहे. आकाश हे नित्य आहे इ०

**दृष्टापचारज**–वि., **ऐहिकलौकिकाद् व्याधिकारणाज्जातः** ( अहसू. १२.५७ )

रोगाची जी कारणे समजण्यात येऊ शकतात त्या कारणांपासून झालेला रोग.

**दृष्टार्तव**–वि., **दृष्टमार्तवं यस्मिन् काले, स दृष्टार्तवः कालः ऋतुः स च द्वादशरात्रं भवति** ( सुशा. ३.६ ) **दृष्टार्तवर्तुमत्त्वादेव स्त्री ऋतुमती दृष्टार्तवा वा अभिधीयते** ( सुशा. ६.८ )

ज्या काळात रजःस्राव ( आर्तव ) दिसते तो काल. ऋतु, तो बारा रात्री असतो म्हणून या काळात स्त्री ऋतुमती, दृष्टार्तवा म्हटली जाते.

**दृष्टार्थ**–वि., **प्रत्यक्षज्ञानवान्** ( सुशा. ५.५१ ) **प्रमाणान्तरोपलब्धियोग्यार्थः** ( चवि. ८.३८ )

प्रत्यक्ष ज्ञान असणारा, प्रत्यक्षज्ञानी.
अन्य प्रमाणाने कळण्यास योग्य.

**दृष्टि**–स्त्री., **कृष्णमण्डलस्य मध्यवर्ति रूपग्राहकचक्षुरिन्द्रियम्** ( सुउ. १.१३ ) **नेत्रम्** ( सुसू. १२.९ ) **मसूरदलमात्रा, पञ्चभूतप्रसादजा, खद्योतविस्फुलिङ्गाभाऽव्ययतेजोभिर्विशिष्टा** ( सुउ. ७.३–४ ) **दृष्ट्याश्रयं मण्डलम्** ( सुउ. १७.१ )

बाहुली. काळ्या बुबुळाच्या मध्यात रूपग्रहण करणारे जे इंद्रिय ती दृष्टि; नजर, नेत्र. **प्रमाण**–मसुरीच्या डाळी एवढे. पंचमहाभूतांच्या प्रसादरूप अंशापासून झालेली काजव्यासारखी चमकणारी व कमी न होणाऱ्या तेजाने युक्त अशी दृष्टि. दृष्टीचे आश्रय असलेले मंडळ.

**अतीन्द्रियदर्शनम्** ( चशा. १.१४०-४१ )
अंतर्ज्ञान. इंद्रियांच्या सामर्थ्याच्या पलीकडचे दिसणे.
**उपलब्धिः** ( चइ. ४.२५ )
प्राप्त होणे, मिळणे, दिसणे,

**–कृशता**–स्त्री., **दृङ्मांद्यम्** ( सुउ. ५५.१६ )
दृष्टिमांद्य–नजर कमी होणे.

**–क्लेद**–पु., **दृष्टिगतं जलम्** ( सुचि. २४-१८ )
डोळ्यातील पाणी.

**–गतदोष**–( परिव० )–पु., रोग० द्र० **'नेत्ररोग'** ( सुउ. ७.६ ) डोळ्याचे रोग.

**–गतरोग**–पु., रोग० द्र० **' नेत्ररोग '** ( सुउ. १७.१ ) डोळ्याचे रोग.

**–गतरोगप्रतिषेध**–पु., अध्याय० ( सुउ.१७.१ )
अध्यायाचे नांव–यात दृष्टीमध्ये असलेले रोगनाशक उपचार आहेत.

**–गतरोगविज्ञानीय**–वि., अध्याय० ( सुउ. ७.१ )
अध्यायाचे नाव. यात दृष्टीच्या रोगांची माहिती आहे.

**–दूषण**–वि., **दृष्टिरोगप्रदः** ( अहसू. ६.४० )
दृष्टि दुष्ट करणारे. दृष्टिरोग करणारे.

**–प्रदा वर्ति**–स्त्री., भैषज्य० **त्रिफलाकुक्कुटाण्डत्वगादिभिः कृता एषा वर्तिः अभिन्नचक्षुषोऽन्धस्य दृष्टिप्रदा** ( चचि. २६.२५४–५६ )

दृष्टिदायक वात–त्रिफळा कोंबड्याच्या अंड्याचे टरफल इ० नी केलेली वात–डोळा फुटला नसेल अशा आंधळयाला दृष्टी देते.

**–प्रसाद**–पु., **नयनगोलकस्य संरम्भरागादिरुजाहरणपूर्वकं निर्मलीकरणम्** ( सुउ. १९.४ )
डोळा निर्मळ करणारे. डोळ्याची सूज तांबडेपणा इत्यादि त्रास नाहीसा करून डोळे स्वच्छ करणारे.

**–प्रसादन**–वि., **दृष्टेर्नैर्मल्यजननम्** ( सुउ. १७.७० )
दृष्टि निर्मल स्वच्छ करणारे.

**–बल**–न., **दृष्टेः सामर्थ्यम्** ( असंसू. ३१.१५ )
दृष्टीचे बळ–सामर्थ्य.

**–भाग**–पु., **चक्षुरिन्द्रियाधिष्ठानम्** ( सुशा. २.३५ )
दृष्टि या इंद्रियाचे अधिष्ठान.

**–मण्डल**–न., शारीर० **नेत्रगतमण्डलम्** ( असंशा. ५.५२ ) **नेत्रे कृष्णताराप्रवर्ति विभाग०** ( सुउ. १.१५ )

डोळ्याचे मंडळ. डोळ्यात काळ्या बुबुळाच्या मध्यवर्ती असलेले मंडळ.

**–विभ्रम**–पु., लक्षण० **दृग्भ्रमः** ( असंसू. ८.३७ )
दृष्टीचा विभ्रम, दृष्टीला भ्रम होणे,

**-विशारद**-वि., **शालाक्यतन्त्रनिपुणः, नेत्रचिकित्सकः** ( सुउ. १.१३ )
दृष्टीचे शारीर निदान व उपचार या सर्वात निपुण. सळईच्या उपयोगाच्या उपचार-पद्धतीत निपुण. नेत्रचिकित्सक.

**-विष**-वि., **दृशि विषं यस्य सः (सर्पः)** ( सुक. ३.५ )
ज्याच्या दृष्टीत विष आहे तो. ( सर्प )

**-हनन**-(परिव०) न., **रोग० दृष्टिनाशः** (सुउ. ६.२०)
दृष्टिनाश. नजर जाणे.

**दृष्ट्यन्तर**-न., **दृष्टी कृष्णतारके मसूरदलप्रमाणे भवतः तयोर्दृष्ट्योरन्तरं चतुरङ्गुलम्** ( सुसू. ३५.१२ )
दृष्टि. काळ्या बुबुळाच्या मध्यात असलेल्या बाहुल्या मसूराच्या डाळी एवढ्या असतात. त्या बाहुल्यातील अंतर चार अंगुळे असते.

**दृष्ट्याश्रयरोग**-पु., **रोग० पित्तविदग्धदृष्ट्यादयः षड्रोगास्तेष्वेकः** ( सुउ. ७.३४-३५ )
दृष्टीच्या आश्रयाने असलेला रोग. पित्ताने दुष्ट दृष्टि इत्यादी सहा रोगापैकी एक.

**दृष्ट्युपघात**-पु., **लक्षण० आघातजन्यं दृष्टिवैकल्यम्** ( सुशा. ६.२७ )
आघाताने झालेली दृष्टिविकलता. दृष्टीला आघात.

**दृष्ट्युपरोध**-पु., **लक्षण० दृष्टिमन्दता, सविषान्नसेवनाद् भवति** ( चचि. २३.११४ )
दृष्टि मंद असणे. विषयुक्त अन्नसेवनाने होते.

**देव**-पु., **इन्द्रादिः** ( चनि. ७.१० ) ( सुक. ५.९ )
इंद्र इत्यादी देव.
**अमानुषगुणयुक्तो राजा देव इति संज्ञितः, तस्य गुणाः-आज्ञा, त्यागः, क्षमा, धैर्यं, विक्रमश्च** ( सुसू. ३४.१०-११ )
अमानुष गुण युक्त राजा देव म्हटला जातो. त्याचे **गुण**-आज्ञा, त्याग, क्षमा, धैर्य आणि पराक्रम.
**मेघः** ( सुउ. ६१.१९ ) मेघ.
**खनिज० पारदः** ( रा. १३.४३ ) पारा.

**( देवी )**-स्त्री., **पार्वती देवी** ( र. ११.१३० )
पार्वती देवी.
**वनस्पति० अतसी** ( रा. १६.१८७ )
आळसी. जवस.
**कर्कोटकी** ( ध. १.१८७ ) कर्टोली.
**पाठा** ( ध. १.७० ) पहाडमूळ.
**बला, बृहद्बला** ( र. ११.३७-३९ ) मोठी बला.
**भूतुम्बी** ( रा. ७.२४१ ) भुईभोपळा.
**मूर्वा** ( ध. १.१३ ) मोरवेल.
**मृगाक्षी** ( रा. ७.२५८ )
मृग चिभडे, लहान चिभडे.
**वन्ध्यकर्कोटकी** ( ध. १.१८५ ) वांझकर्टोली.
**शालिपर्णी** ( रा. ४.११४ ) सालवण.
**स्पृक्का** ( ध. ३.६२ ) पिंडका.
**लिङ्गिनी** ( रा. परि. ३.१७ ) शिवलिंगी.
**हरीतकी** ( रा. ११.३०७ ) हिरडा.

**-काष्ठ**-न., **वनस्पति० देवदारुः** ( ध. १.७७ )
देवदार.

**-कुरम्बा**-स्त्री., **वनस्पति० महाद्रोणा** ( रा. परि. ५.५० )
मोठा शेत कुंभा; मोठा कुंभा.

**-कुसुम**-न., **वनस्पति० लवङ्गम्** (ध. ३.४१) लवंग.

**-गन्धा**-स्त्री., **वनस्पति० महामेदा** ( रा. ५.१६४ )
महामेदा. महौषधी. अष्टवर्गापैकी एक.

**-गिरि**-पु., **पर्वत० अत्र चन्द्रमोऽभिधानः सोमविशेष उपलभ्यते** ( सुचि. २९.२७ )
एक पर्वत. चंद्रमा हे दुसरे नाव. एक जातीची सोमवल्ली यावर होते.

**-जुष्ट**-वि., देवाविष्टः, **सन्तुष्टः शौचयुक्तो गन्धमाल्याभिलाषी निस्तन्द्रो यथार्थभाषी तेजस्वी निमेषरहितो वरप्रदाता ब्रह्मण्यश्च भवति देवग्रहाविष्टो नरः** ( सुउ. ६०.८ )
देवाने धरलेला रोगी. संतुष्ट, शुचित्व पाळणारा, गंध फुले यांची इच्छा असणारा, झापड नसलेला, खरे बोलणारा, तेजस्वी, डोळे न मिटणारा, दुसऱ्याला वर देतो असे बोलणारा व धार्मिकवृत्तीचा असतो.

**-ताड**-पु., **वनस्पति० देवदाली** ( ध. १.१७३ )
देवडांगरी.

**-ताडक**-पु., **वनस्पति० देवदाली** ( च. क. २३).
देवडांगरी.

**-दंशक**-न., **वनस्पति० कत्तृणम्** ( ध. १.८० )
रोहिसगवत.

**-दण्डा**-स्त्री., **वनस्पति० बलाभेदः नागबला** ( रा. ४.४२८ ) **द्र० 'बला'**
नागबला, एक चिकणा.

**-दारु**-पु. न., **वनस्पति० सुगन्धिवृक्षः** ( न ३.२५ ) **व्रणधूपनद्रव्यम्** ( सुसू. ३७.२१ )
**गुणाः-तिक्तः, उष्णः, स्निग्धो** ( ध ),

( रा ), वातकफजिदामदोषविबन्धाऽऽध्मानप्रमेह-भूतदोषघ्नः (ध. १.७६) शोथतन्द्राहिक्काज्वरास्रजित्
( र. १३.४९ )

हिं.—देवदार.
**म.—देवदार.**
गु.—देवदार.
बं.—तून.
त.—देवदारु.
फा.—देवदार.

देवदार. सुगंधी वृक्ष. व्रणाला धुरी द्यावयाचे द्रव्य. **गुण**—कडु, उष्ण, स्निग्ध, रूक्ष, वातकफनाशक, आमदोष, अवष्टंभ, पोटफुगी, प्रमेह, भूतबाधा, सूज, झापड, उचकी, ताप, रक्तस्रावनाशक.

**–दारुतैल**–न., तैल० **तिक्तं कटु कषायं दुष्टव्रणशोधनं कृमिकफकुष्ठानिलहरम्** ( सुसू. ४५.१२३ ) देवदाराचे तेल. **गुण**—कडु, तिखट, तुरट, दुष्टव्रणशोधक, कृमी, कफ, कुष्ठ, वातनाशक.

**–दाली**–स्त्री., वनस्पति० **तद्गुणाः—तिक्ता, कटु, उष्णा, छर्दिकृत्, कफघ्नी, ज्वरश्वासकासहिध्माऽरुचिक्षयशोथपाण्डुकामलागरभूतनाशिनी**
( रा. ३.२४४–२४५ ) ( ध. १.१७३–७४ )

हिं.—सोनैया.
**म.—देवडांगरी, देवदाली.**
गु.—कुकडवेला.
बं.—देयाताडा.

देवडांगरी. कडु, तिखट, ओकारी करणारी, कफनाशक, ज्वर, श्वास, खोकला, उचकी, अरुचि, क्षय, सूज, पांडु, कावीळ, कृत्रिमविष व भूतबाधानाशक.

**–दासी**–स्त्री., वनस्पति० **बीजपूरकः** ( रा. ११.३४ ) महाळुंग.

**–दुन्दुभि**–पु., वनस्पति० **तुलसी** ( ध. ४.५० ) तुळस.

**–दूती**–स्त्री.,वनस्पति० **बीजपूरकः** ( रा.११.३३ ) महाळुंग.

**–द्रु**–पु., वनस्पति० **देवदारुः** (र. २६.३८) देवदार.

**–द्रुम**–पु., वनस्पति० **देवदारुः** ( र. २६.३६ ) देवदार.

**–द्रोह**–पु., मनोभाव० **देवगुरुसिद्धानां द्रोहः**
( सुसू. २४.७ )
देव, गुरु, सिद्ध यांचा द्वेष.

**–धान्य**–न., वनस्पति० **यावनालः** ( रा. १६.१६९ ) जोंधळा.

**–धूप**–पु., निर्यास० **रालः** ( र. २०.१९६ ) राळ.

**–नालोत्तम**–पु., वनस्पति० **महानलः**
( ध. ४.१४२ )
मोठा नळ नावाची वनस्पती.

**–निर्मिता**–स्त्री., वनस्पति० **गुडूची** ( ध. १.३ ) गुळवेल.

**–पर्ण**–न., वनस्पति० **सुरपर्णकः** (रा. परि. १०.५०) सुरपीण.

**–पुत्रिका**–स्त्री., वनस्पति० **स्पृक्का** ( ध. ३.६२ ) पिंडका.

**–पुत्री**–स्त्री., वनस्पति० **स्पृक्का** ( ध. ३.६२ ) पिंडका.

**–प्रिय**–पु., वनस्पति० **भृङ्गराजभेदः पीतभृङ्गराजः** ( रा. ४.२१ ) द्र० **' भृङ्गराजः '**
माक्याचा प्रकार, पिवळा माका.

**–बला**– स्त्री., वनस्पति० **त्रायमाणा** ( रा. ५.३७९ ) त्रायमाण.

**–मणि**–पु., वनस्पति० **महामेदा** ( ध. १.१२७ ) मोठी मेदा. अष्टवर्गापैकी एक.

**–यजनागार**–न.,**देवयजनस्याऽगारम्** ( चक. १.९ ) देवाच्या पूजेचे घर, देवघर, देऊळ.

**–लाङ्गुलिका**–स्त्री., वनस्पति० **वृश्चिकाली** ( रा. परि. ९.८ ) विंचवी.

**–वन्ध्या**–स्त्री., **देवकोपेन जायमानो वन्ध्याभेदः**
( र. २२.२ )
देवाच्या प्रकोपाने झालेली वन्ध्या. वंध्येचा प्रकार.

**–शत्रु**–पु., **दैत्याख्यो ग्रहः** ( सुउ. ६०.९ ) दैत्य नावाचा ग्रह.

**–शत्रुजुष्ट**–पु., **दैत्यग्रहाविष्टः, तल्लक्षणानि–प्रस्वेदयुक्तो देवद्विजगुरुनिन्दको वक्रलोचनो निर्भयो विमार्गाहितदृष्टिः प्रभूतैरप्यन्नपानैरसन्तुष्टो दुष्टस्वभावश्च भवति** ( सुउ. ६०.९ )
दैत्यग्रहाने धरलेला. **लक्षणे**—घाम येतो. देव ब्राह्मण गुरु यांची निंदा करतो. वाईट मार्गाकडे दृष्टि असते, पुष्कळ अन्नपानानेही असंतुष्ट असतो. स्वभावाने दुष्ट, बेडर, व वाकड्या डोळ्याचा असतो.

**–शेखर**–पु., वनस्पति० **दमनम्** ( रा. १०.१२० ) दवणा.

**–श्रेणी**–स्त्री., वनस्पति० **मूर्वा** (ध. १.१३) मोरवेल.

**–सर्षपक**–पु., वनस्पति० **कटुरुष्णो रुच्यः कफनाशनो जन्तुदोषहरो वक्त्रामयविशोधनः** (रा. परि. ९.४२)

देवमोहरी. तिखट, उष्ण, रुचकर, कफनाशक, जंतुदोषनाशक, तोंडाच्या रोगांची शुद्धि करणारी.

**–सहगिरि**–पु., (परिव०) पर्वत० **अत्र चन्द्रमोऽभिधानः सोमविशेष उपलभ्यते** (सुचि.२९.२७)

एक पर्वत. यावर चंद्रमा नांवाची सोमाची एक जात सापडते.

**–सहा**–स्त्री., वनस्पति० **महाबला** (ध. १.२८२)

मोठी बला, मोठा चिकणा.

**–सुन्द्**–पु., जलाशय० **अत्र चंद्रमोऽभिधानः सोमविशेष उपलभ्यते** (सुचि. २९.२८)

एका सरोवराचे नांव, येथे चंद्रमा नावाची सोमवल्लीची जात सापडते.

**–सेना**–स्त्री., **अष्टोत्तरशतमङ्गलपदार्थेष्वेकः** (असंशा. १२.८)

एकशे आठ मंगल पदार्थातील एक.

**–हृद्या**–स्त्री., वनस्पति० **ताम्बूली** (ध. परि. ३.२)

देवाला आवडणारी. विड्याच्या पानाची वेल.

**देवता**–स्त्री., वनस्पति० **धत्तूरः** (ध. ४.७) धोतरा.

**देवल**–पु., ऋषि० **रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः** (चसू. १.१०)

एक ऋषि. रोगोपचारांच्या विचारविनिमयाकरिता हिमालयाच्या उतरणीवर एकत्र झालेल्या महर्षीपैकी एक.

**देवाद्वय**–न., वनस्पति० **सहदेवा विश्वदेवा च** (अहसू. १५.९)

सहदेवी. चिकणाभेद. मुद्रिका.

**देवार्ह**–न., वनस्पति० **सुरपर्णकः** (रा. परि. १०.५०)

सुरपीण.

**(देवार्हा)**–स्त्री., वनस्पति० **महाबला** (रा. ४-४२५)

मोठी बला, मोठा चिकणा.

**देवाह्व**–पु., वनस्पति० **देवदारुः** (अहसू. १५.३५)

देवदार.

**देवाह्वय**–पु., **सुरदारुः** (अहसू. १५.९)

देवदार.

**(देवी) काण्डा**–स्त्री., वनस्पति० **महाद्रोणा** (रा. परि. ५.५०)

मोठा कुंभा; मोठा शेतकुंभा.

**देवी–भागवतम्** (र. २२.२०–२१) देवीभागवत.

**–रज**–न., खनिज० **गन्धकः** (र. २.२) गंधक.

**–शास्त्र**–न., देवी पार्वती, **तदुक्तं रसविद्याशास्त्रम्** (र. २२.२०–२१)

देवी पार्वतीने सांगितलेले पारदविद्याशास्त्र.

**–शुक्र**–न., खनिज० **अभ्रकम्** (र. २.२) अभ्रक.

**देवेष्ट**–पु., निर्यास० **रालः** (रा. १२.१७६) राळ. धूप. **गुग्गुलुः** (रा. १२.१८४) गुग्गुल.

**(देवेष्टा)**–स्त्री., वनस्पति० **महामेदा** (रा. ५.१६३)

मोठी मेदा. अष्टवर्गापैकी एक.

**बीजपूरकः** (रा. ११.३४) महाळुंग.

**देवोन्मत्त**–पु., देवाविष्टः, **लक्षणानि–सौम्यदृष्टिं गम्भीरमधृष्यमकोपनमस्वप्नभोजनाभिलाषिणमल्पस्वेदमूत्रपुरीषवातं शुभगन्धं फुल्लपद्मवदनं देवोन्मत्तं विद्यात्** (चचि. ९.२०)

देवाने धरलेला. देवाचा उन्माद. दृष्टि सौम्य असते. गंभीर, धृष्टता न करणारा, न संतापणारा, झोप व भोजनाची इच्छा नसलेला, थोडा घाम, मळ, मूत्र, व वात असलेला, सुगंधी व फुललेल्या कमळा सारख्या मुखाचा.

**देश**–पु., **स्थानम्** (चवि. १.२२ (२) **अधिष्ठानम्** (चवि. ८.७५) **देशो द्विविधः भूमिः, आतुरश्च** (चवि. ८.८४) **भूमिर्देहश्च** (अहसू. १.२३) **भूमिप्रविभागः त्रिप्रकारकः–आनूपो जाङ्गलः साधारणश्च** (चक. १.८–९) (सुसू. ३५.४२)

प्रदेश, स्थान. देश दोन प्रकारचा. जमीन व रोगी. (शरीर), जमीन व शरीर. भूमिभाग प्रकार (तीन) १ पाणी व झाडी जास्त असलेला, २ पाणी व झाडी फार कमी असलेला भाग. व ३ मध्यम.

**–प्रधान**–पु., **देशाध्यक्षो देशाधिपो वा** (चवि. ३.२०)

देशाचा अध्यक्ष किंवा देशाचा मुख्य.

**–सात्म्य**–न., **देशविपरीतगुणम्** (चवि. १.२२ (५) **भूमिसात्म्यम्, तच्च समुदायैकदेशभेदेन द्विविधं–तत्र समुदायस्य यथा–जाङ्गलदेशे य' तौ विपरीतौ, आनूपे कफोल्ब गुणरूक्षादिगुणोपेतौ आह्ा नामपि यथा बाह्लीकपल्लवर्च माध्वीकादिभिः सात्म्यम् ।**

देशाचे दृष्टीने विपरीत गुणा आत्मसात् होणे, देशाच्या गुणा

सात्म्य होत असते. हे सात्म्य दोन प्रकारचे. समुदायसात्म्य व एकदेशसात्म्य. **समुदायसात्म्य**-कमी पाणी व झाडे असणाऱ्या प्रदेशात जो आहार व आचार तो पुष्कळ पाणी व झाडे असणाऱ्या प्रदेशात विपरीत असतो. पहिल्यात वातोल्बणत्वाने वात विपरीत स्निग्ध गुरु इत्यादि गुणांचा आहाराचार विपरीत व दुसऱ्यात कफोल्वणत्वामुळे रूक्षादि गुणांचा आहाराचार विपरीत. पंजाब इत्यादी देशात गहू उडीद इ० सात्म्य असतात.

**–सात्म्याध्याय**–पु., **अध्यायविशेषस्य संज्ञा** ( काखिल. २५.१ )
देशाचे सात्म्य सांगितलेला अध्याय.

**–देशिक**–पु., **गुरुः** ( र. ७.३० ) **उपदेष्टा** ( असंनि. ६.७ ) गुरु, उपदेशक.

**–देश्य**–वि., **प्रायेण तुल्यम्** ( सुक, ४.३६ )
तुल्य, बरोबरीचे.

**देह**–पु., **शरीरम्** ( सुउ. ६६.६–७ ) **स्थूलकृशमध्यभेदेन त्रिविधो देहः** (सुसू. ३५.३३) **द्र० 'शरीर'**
देह, शरीर. स्थूल कृश मध्य असे तीन प्रकारचे शरीर.

**–कृत्**–वि., **शरीरदार्ढ्यकारी** ( र. २.७१ )
शरीर दृढ करणारे.

**–खेद्**–पु., **देहश्रमः** ( असंसू. ९ ) शारीरश्रम.

**–चिन्तक**–वि., **शरीरविषये विचारणपरः** ( सुउ. ३७.१० )
शरीर या विषयाचा विचार करणारा.

**–द**–पु., **खनिज० पारदः** ( रा. १३.४२ ) पारा.

**–( दा )**–स्त्री., **वनस्पति० ताम्बूली** ( ध. परि. ३.३ )
विड्याच्या पानाची वेल.

**–धातु**–पु., **रसादिधातुः** ( चचि. १५.५ )
रस रक्त इत्यादी धातु.

**–धारण**–न., **देहस्य धारणम्** ( असंसू. १०.३ )
शरिराचे धारण.

**–धृष्**–वि., **देहधारकः** ( सुनि. १.१३ )
शरीर धारण करणारा.

**–प्रकृति**–स्त्री., **देहस्वास्थ्यम्** ( चक्र. चसू. ७.४० )
शरिराचे स्वास्थ्य, आरोग्य.

**–बन्ध**–पु., **देहस्य मूर्तिराकृतिश्च** ( असंशा. ८.३२ )
शरिराची मूर्ति, आकृति, आकार.

**–बल**–न., **देहसामर्थ्यम्** ( सुसू. १५.५ ( १ )
शरिराचे सामर्थ्य–बळ.

**–बृहत्त्वकृत्**–वि., **पुष्टिप्रदम्, देहबृंहणकरम्** ( असंसू. २४.५८ )
शरीर मोठे–जाड करणारे. पौष्टिक.

**–भेद** (परिव०)–पु., **देहविनाशः, मृत्युः** (सुनि.१.२१)
देहनाश, मृत्यु.

**–वृत्ति**–स्त्री., **देहस्यारोग्यम्** ( चवि. ३.१४ )
शरिराचे आरोग्य.

**–वेदना**–स्त्री., **शारीरव्यथा** ( कासू. २५.४ )
शरिराची व्यथा, वेदना.

**–सन्धुक्षण**–न., **शक्त्युपचयलक्षणबलसंदीपनं पुष्ट्यादिवहमित्यर्थः** ( ड, सुचि. ३१.५७ )
बळ पुष्टि लक्षणात्मक बळाचे संवर्धन. पुष्टि बळ प्राप्त करून देणारे.

**–संभवहेतु**–पु., **देहोत्पत्तिहेतुः** ( सुसू. २१.३ )
शरिराच्या उत्पत्तीचे कारण.

**–सात्म्य**–न., **देहस्य सात्म्यं नाम उपशयः** ( असंसू. ७.२३५–२३६ )
शरिराला आत्मसात् होणारे. उपशय–आरोग्यदायक

**देहली**–स्त्री., **गृहद्वाराधःकाष्ठम्** ( चशा. ८.१९ ) **द्वारदेहसंरक्षिका** ( र. १०.३६ )
उंबरठा. घराच्या दरवाजाचे खालचे लाकूड.

**देहिन्**–वि., **देहवान् देहविशिष्टो वा ( आत्मा )** ( चशा. १.७९ )
पु., **मनुष्यः** ( सुचि. ३६.२७ )
देहवान्, देहयुक्त, आत्मा, मनुष्य.

**देहेन्द्रियमनस्तापिन्**–वि., **देहमिन्द्रियं मनश्च तापयति पीडयतीति** ( चचि. ३.४ )
शरीर मन व इंद्रिये यांना त्रास देणारे.

**देहोष्मन्**–पु., **सकलशरीरगतोष्णत्वम्** ( चचि. ३.१३० ) **देहस्यौष्ण्यम्** ( असंसू. ३७.२६ )
सर्व शरीरातली उष्णता. शरिराची उष्णता.

**देहौजस्**–न., **देहस्यौजः, देहसारः** ( चसू. १७.६० )
शरिरातले ओज. सारद्रव्य.

**दैत्यमेदज**–पु., **निर्यास० गुग्गुलुः** ( रा. १२.१८८ )
गुग्गुळ.

**दैत्या**–स्त्री., **वनस्पति० मुरा** ( ध. ३.६७ ) मोरवेल.

**दैन्य**–न., **लक्षण० क्लिष्टचित्तता** ( सुसू. १.२५ ( ३ ) **ग्लानिः** ( ड. सुउ. ३९.८३ )
क्लिष्ट मन असणे, ग्लानि. दीनवाणे असणे. खिन्नता.
**रोदनादि** ( चवि. ४.८ ) रडणे इत्यादी.

**दैर्घरात्रिक**–वि., **दीर्घकालानुबंधी अथवा दीर्घां रात्रिं मरणरूपां करोतीति दैर्घरात्रिकः** ( ज्वरः )
( चचि. ३.५२-५३ )
दीर्घ काल टिकून रहाणारा. मरणरूपी दीर्घ रात्र करणारा ज्वर दैर्घरात्रिक.

**दैर्घ्य**–वि., **दीर्घताऽऽधिक्यं वा** ( अहृसू. ४.३० )
लांबी. आधिक्य.

**–श्रवस**–पु., ऋषि० ( असंसू. ९.११५ ) एक ऋषि.

**दैव**–न., **पौर्वदेहिकमात्मकृतं यत् कर्म तद् दैवम्, 'दैवमात्मकृतं विद्यात् कर्म यत् पौर्वदेहिकम्'** ( चवि. ३.३० ) **तच्च कालजरोगस्य हेतुः**
( चशा. १.११६ )
पूर्वजन्मात आपण केलेले ते दैव. ते कालज रोगाचे कारण.
वि., **देवस्येदमिति दैवम्, देवनिमित्तकं देवसम्बन्धि वा** ( सुसू. २९.१७-१८ )
देवाचे ते दैव. देवसंबंधी. देवाच्या निमित्त असलेले.

**–जन्मन्**–वि., **दैवात् पूर्वजन्मकृतकर्मणो जन्म उत्पत्तिर्येषां ते ( रोगाः ) अदृष्टहेतवः**
( असंसू. २२.४ )
दैवयोगाने पूर्वजन्मी केलेल्या कर्मामुळे उत्पत्ति झालेले ( रोग ). दैवाने केलेले, झालेले.

**–बलप्रवृत्त**–वि., **दैवशक्तिजातः**
**द्र० 'रोग'** ( सुसू. २४.७ )
दैविक शक्तीने झालेला.

**–व्यपाश्रय**–वि., **अदृष्टसंश्रयी** ( उपक्रमविशेषः ) **व्याधिप्रतिकारार्थमदृष्टमाश्रित्य क्रियमाणं बलिमङ्गलादि** ( चसू. १.५८ ) **मन्त्रौषधिमङ्गलबल्युपहारहोमनियमप्रायश्चित्तोपवासस्वस्त्ययनप्रणिपातगमना–दिदैवव्यपाश्रयं औषधं भेषजम्**
( चसू. ११.५४; चवि. ८.८७ )
दैवी उपाय. रोगाच्या प्रतिकाराकरिता दैवाला कौल लावण्याच्या दृष्टीने बळी मंगलकार्य होमहवन करणे. मंतरलेल्या औषधि मंगलकर्मे बळी देणे पूजा होमहवन व्रत प्रायश्चित्त उपवास पुण्याहवाचन देवनमस्कार यात्रा इत्यादी दैवी उपचार–हेच औषध होत.

**दोःपाद**–पु., **हस्तः पादश्च** ( र. २३.७ ) हात व पाय.

**दोग्ध्री**–वि., **दुग्धवती** ( चशा. ८.५२ )
**बहुक्षीरा** ( सुशा. १०.२५ )
दूध असणारी, दुभती. पुष्कळ दूध असणारी.



**दोलायन्त्र**–न., **यन्त्र० स्वेदनयन्त्रम्, तत्स्वरूपं मुखस्योभयतः कृतद्वारद्वये स्थापितस्य दण्डस्य मध्ये निहितायाः पोट्टल्याः परिपाचनार्थं निर्मितं द्रवेणार्धपूरितं भाण्डम्** ( र. ९. ३–४ )
पाचकयंत्र. भांड्याच्या तोंडाजवळ समोरासमोर दोन भोके पाडून त्यात आडवी काडी–सळई घालून त्याला पचन करावयाची, पारा इत्यादी द्रव्ये घातलेली पोटली टांगून त्यात अर्धे भांडे औषधियुक्त पाणी घालतात व खाली अग्नि लावतात.

**दोष**–पु., **वातादिः, तत्संज्ञा निरुक्तिश्च–दूषणस्वभावत्वाद्दोषः, दूषयति नाम विकारं जनयतीति दोषः** ( असंसू. २०.३ ) **तत्सङ्ख्या–वायुः पित्तं कफश्चेति समासतस्त्रयो दोषाः** ( चसू. १.५७; अहृसू. १.६) **रक्तस्यापि दोषत्वं सुश्रुतवचनाधारेण पूर्वटीकाकारैराषाढधर्मदासादिभिः स्वीकृतमस्ति** ( मधुकोश मा. पंचनिदान ) **तत्र वायौ, वा गतिगन्धनयोरिति धातुः । पित्ते, तप सन्तापे इति । श्लेष्मणि, श्लिष आलिङ्गने इति । एतेषां कृद्विहितैः प्रत्ययैर्वातः पित्तं श्लेष्मा इति च रूपाणि भवन्ति** ( सुसू. २१.५ ) **तत्पर्यायाः– वायुर्वातः पवनो मारुतः समीरणश्चेति वातस्य, पित्तमग्निश्चेति पित्तस्य, श्लेष्मा कफो बलासश्चेति कफस्य, तदुत्पत्तिः–पञ्चमहाभूतेभ्यः अविकृतानां वातादिदोषाणामुत्पत्तिः, तत्र वाय्वाकाशधातुभ्यो वायुः, आग्नेयं पित्तम्, अम्भःपृथिवीभ्यां श्लेष्मा** (असंसू. २०.३) **तद्देवताः– वातपित्तकफा द्वे द्वे देवते आश्रिताः । वायुर्मारुतमाकाशं च, पित्तमग्निमादित्यं च, कफः सोमं वरुणं च श्रितः** ( का.वि. ) **अविकृतदोषाणां स्थानानि–त्रिदोषाः सर्वदेहचराः सर्वदेहव्यापिनश्च सन्ति । तत्रापि हृदयादूर्ध्वं कफो विशेषेण, पित्तं हृदयनाभ्योर्मध्यभागे वायुर्नाभेरधोभागे च तिष्ठति । पुनश्च पक्वाशयकटीसक्थिश्रोत्राऽस्थिस्पर्शनेन्द्रियं स्थानं वातस्य, तत्रापि पक्वाधानं विशेषतः । नाभिरामाशयः स्वेदो लसीका रुधिरं रसो दृक्स्पर्शनं च पित्तस्थानानि, नाभिस्तत्र विशेषतः । उरःकण्ठशिरःक्लोमपर्वाण्यामाशयो रसो मेदो घ्राणं जिह्वा च कफस्थानानि तत्रोरस्तु विशेषतः** ( अहृसू. १२.१-३ ) **तत्कालः–अहो-**

रात्रिभुक्तानामन्तमध्यप्रथमकालेषु क्रमशो वातपित्तकफानामुत्पत्तिर्वृद्धिर्वा भवति। तथा बाल्ये कफस्य, यौवने पित्तस्य, वार्धक्ये वातस्य च वृद्धिर्भवति (अहृसू. १.८) ऋतुषु दोषगतिः– वायोर्ग्रीष्मे चयो, वर्षासु प्रकोपः, शरदि प्रशमश्च; पित्तस्य वर्षासु चयः, शरदि प्रकोपो हेमन्ते प्रशमश्च; श्लेष्मणः शिशिरे चयो, वसन्ते प्रकोपो ग्रीष्मे प्रशमश्च भवति। तत्र ग्रीष्मकाले लघुरूक्षादिभिरोषधीभिस्तद्विधो वायुर्लघुरूक्षे देहे चीयते, परन्तु ग्रीष्मकालस्यौष्ण्याद्वातस्य प्रकोपो न भवति। वर्षासु सर्वगुणैर्वातस्य प्रकोपो भवति। वर्षास्वम्लविपाकादिभिरोषधीभिस्तादृशं पित्तं चयं याति। वर्षाकालस्य शैत्यतः पित्तस्य कोपो न भवति। वर्षाशीतोचिताङ्गानां नराणां वर्षासु संचितं पित्तं शरदर्करश्मिभिः सहसा तापेन कुप्यति। हेमन्ते शिशिरे च स्निग्धशीताभिरोषधीभिः कफश्चीयते। कालदेहयोस्तुल्यत्वेऽपि स्कन्नत्वात्कफस्य प्रकोपो न भवति। वसन्ते सूर्यसन्तापात्कफस्य विलयनं, ततः प्रकोपश्च भवति (अहृसू. १२.२४-२७) दोषसम्बन्धादग्निस्वरूपम्–वातेन विषमोऽग्निः पित्तेन तीक्ष्णः, कफेन मन्दश्च भवति। समैर्दोषैः समोऽग्निर्भवति। कोष्ठोऽपि वातेन क्रूरः, पित्तेन मृदुः, कफेन मध्यः, समैरपि दोषैश्च मध्य एव भवति (अहृसू. १.८–९) दोषाणां गतिविशेषाः–अवस्थाभेदेन दोषगतिः प्राकृती वैकृती चेति द्विविधा। वर्षादिषु पित्तादीनां चयप्रकोपप्रशमास्तु कालकृता गतिः। क्षयः स्थानं वृद्धिश्चेति दोषाणां प्रमाणतस्त्रिविधा गतिः। ऊर्ध्वमधस्तिर्यक् चेति देहे त्रिविधा गतिः। तथा कोष्ठशाखामर्मास्थिसन्धिषु च त्रिविधा गतिः (चसू. १७.११२-११५) अविकृतदोषकर्माणि – उत्साहोच्छ्वासनिःश्वासचेष्टावेगप्रवर्तनैर्धातूनां सम्यग्गत्याऽक्षाणां पाटवेन चाविकृतो वायुर्देहमनुगृह्णाति। अविकृतं पित्तं पक्त्यूष्मदर्शनैः क्षुत्तृड्रुचिप्रभामेधाधीशौर्यतनुमार्दवैर्देहमनुगृह्णाति। अविकृतः श्लेष्मा स्थिरत्वस्निग्धत्वसन्धिबन्धक्षमादिभिर्देहमनुगृह्णाति (अहृसू. ११.१–३) तथा च शुक्रार्तवादिसहकारितया दोषा एव देहसंभवहेतवो भवन्ति (सुसू. २१.३) विकृतवृद्धदोषकर्माणि– कार्श्यकार्ष्ण्योष्णकामित्वादीनि वातस्य, पीतविण्मूत्रनेत्रत्वगादीनि पित्तस्य, अग्निसदनप्रसेकाऽऽलस्यगौरवादीनि श्लेष्मणश्च (अहृसू. ११.५-७; असंसू. १९.६) दोषसामान्यचिकित्सा – क्षीणा बृंहयितव्याः, कुपिताः प्रशमयितव्याः, वृद्धा निर्हर्तव्याः, समाः परिपाल्या इति (सुचि. ३३.३) कुपितं त्वविरोधयन् चये एव दोषं जयेत्। सर्वकोपे शेषदोषाविरोधतो बलीयांसं दोषं जयेत् (अहृसू. १३.१५; असंसू. २१.१५-१७) शरीरजानां वातपित्तकफानां विकृतदोषाणां क्रमेण बस्तिविरेकवमनानि तैलघृतमधूनि च परमौषधानि (अहृसू. १.२५-२६)

दोष–वात इत्यादी. शरिराला दूषित करण्याचा स्वभाव असलेले घटक. दूषणस्वभावामुळे दोष दूषित करतात–विकार उत्पन्न करितात म्हणून दोष. प्रकार–वात पित्त कफ हे तीन दोष. सुश्रुताच्या मताने रक्तही चौथा दोष आहे. शरीरधारण स्वभावामुळे हे धातूच आहेत. निरुक्ति–वा गतिगंधने धातूपासून वात, तप् संतापे धातूपासून पित्त आणि श्लिष् आलिंगने धातूपासून श्लेष्मा अशा संज्ञा तयार झाल्या. पर्यायशब्द–वात–वायु वारा पवन मारुत आणि समीरण. पित्त–पित्त व अग्नि. कफ–श्लेष्मा बलास व कफ. उत्पत्ति–अविकृत अशा वातपित्तकफांची उत्पत्ति पंचमहाभूतांपासून झाली आहे. वायु व आकाश या धातूंपासून वायुधातु, अग्नीपासून पित्तधातु व जल आणि पृथ्वी धातूंपासून कफधातु निर्माण होतो. देवता–हे प्रत्येक दोष देवतांवर आश्रित आहेत. वायूची मारुत व आकाश देवता, पित्ताची अग्नि व आदित्य आणि कफाची सोम व वरुण देवता यांचेवर हे आश्रित आहे. अविकृत दोष शरिराचे धारक म्हणून धातु असतात. त्या वेळी ते दोष नसतात. त्रिधातूंची स्थाने–वात पित्त कफ सर्व शरीरात संचार करतात, ते सर्व शरीरव्यापी आहेत, तथापि हृदयाच्या वर विशेषतः कफ, हृदय व नाभि यांमध्ये पित्त, व नाभीच्या खाली वायु असतो. वायु पक्वाशय कटीचा सर्व भाग मांड्या कान अस्थि व स्पर्शनेंद्रिय म्हणजे त्वचा यात. पित्त हे नाभि आमाशय घाम लस रक्त रस दृष्टि व स्पर्शनेंद्रियात. आणि कफ छाती घसा डोके क्लोम बोटांची पेरी आमाशय रस मेद घ्राणेंद्रिय (नाक)

व जीभ यात असतो. विशेषस्थान–वाताचे मलाशय (पुरीषाशय) पित्ताचे नाभि (बेंबीच्या भोवतालचा लहान आतड्याचा भाग) व कफाचे छाती विशेषस्थान होय. **त्यांचा काल**–दिवस रात्र जेवण यांच्या शेवटी वात, मध्ये पित्त, व आरंभी कफ, यांची उत्पत्ति किंवा वृद्धि होते. तसेच बाल्यावस्थेत कफ, तारुण्यात पित्त, म्हातारपणी वाताची वाढ होते. **ऋतूत दोषस्थिति**–ग्रीष्म वर्षा व शरद् ऋतूत वायूचा क्रमाने संचय प्रकोप व शमन होते. वर्षा शरद् व हेमंत ऋतूत पित्ताचा क्रमाने संचय प्रकोप व शम होतो. आणि शिशिर वसंत व ग्रीष्मात कफाचा क्रमाने संचय प्रकोप व शम होतो. ग्रीष्म ऋतूत कालानेच रूक्ष व हलक्या झालेल्या शरिरात हलक्या रूक्ष इ० गुणांच्या आहारादिकांनी त्याच गुणांचा वायु शरिरात संचित होतो. परंतु ग्रीष्मकालाच्या उष्णतेने त्यांचा प्रकोप होत नाही. पण वर्षा ऋतूच्या थंडीची जोड मिळताच प्रकोप होतो आणि सर्व गुणानी तो प्रकोप होतो. वर्षा ऋतूत शरिरात आंबटपणा–घशाशी आंबट येणे जळजळ इ० निर्माण करणाऱ्या आहारादिकांनी पित्ताचा संचय होतो. पण थंडावा असल्यामुळे पित्ताचा प्रकोप होत नाही. तथापि शरद् ऋतूत एकदम उष्णता वाढते व त्यामुळे हे संचित पित्त सर्व गुणांनी प्रकुपित होते. हेमंत व शिशिरात स्निग्ध थंड अशा आहारादिकांनी कफ संचित होतो. शरिरात थंड गुण वाढतो. काल व शरीर दोन्ही शीत असल्यामुळे कफ थिजल्यासारखा असतो. तो वसंतऋतूत सूर्याची उष्णता वाढल्यामुळे वितळतो व त्याचा प्रकोप होतो. हा कालाचा स्वभाव आहे. दोषांचा पाचकाग्नीवर परिणाम– वाताने विषम, पित्ताने तीक्ष्ण (तीव्र) व कफाने मंद होतो तर समदोषांनी अग्नि सम होतो. दोष व कोठा–वाताने कोठा कठिण जड. पित्ताने हलका, मऊ, तर कफाने मध्यम आणि सम दोषांनी मध्यमच होतो. **दोषांच्या गति २. प्राकृत** आणि **वैकृत.** प्राकृत म्हणजे स्वाभाविक व वैकृत म्हणजे अस्वाभाविक. वर म्हटले त्याप्रमाणे त्या त्या ऋतूमध्ये त्याच्या स्वभावाप्रमाणे वातादि दोषांचा संचय, प्रकोप व प्रशम होणे ही कालकृत स्वाभाविक गति. आणि ऋतूंच्या स्वभावाविरुद्ध दोषांचा संचय, प्रकोप होणे ही विकृत गति होय. **प्रमाणाने गतीचे प्रकार ३.**–दोषांचा क्षय, स्थान व वृद्धि. दोषांचे **स्थान** म्हणजे स्वाभाविक अथवा योग्य प्रमाण म्हणजे त्यापेक्षा दोष कमी होणे म्हणजे क्षय व प्रमाण वाढणे म्हणजे वृद्धि. शारीरस्थानानुसार गतिप्रकार ३ –वर, खाली, आणि तिर्यक्. यात **वरची गति**–अंतःकोष्ठातून हृदय मर्मात जाणे. **खालची गति**–अंतःकोष्ठातून बस्ति गुदात जाणे. आणि **तिर्यक् गति**– अंतःकोष्ठातून बाजूला, शाखा म्हणजे हातापायात जाणे. **अविकृत दोषांची–धातूंची कर्मे–वातधातु**–उत्साह उच्छ्वास निःश्वास शरिराची कायिक वाचिक व मानसिक सर्व हालचाल मळमूत्रादिकांचा त्याग करण्याची सूचना व त्याग. सर्व धातूंचा सर्व शरिरात संचार, इंद्रियांचे चातुर्य ही कर्मे करून वातधातु–शरिरावर उपकार करितो. **पित्तधातु**–पचन, उष्णता राखणे, पाहणे (दर्शन) भूक, तहान, रुचि, रूप, धारणाशक्ति, बुद्धि, शूरत्व, शरीर मऊ ठेवणे, या कार्यांनी शरिरावर उपकार करतो. **कफधातु**–शरीर स्थिर व स्निग्ध ठेवणे, संधिबंधन क्षमा इत्यादि कार्यांनी शरीर चालवतो. **शरिराच्या उत्पत्तीचे कारण**–वातादि धातूच शुक्र व आर्तव यांच्या सहकार्याने शरीर निर्माण करितात. **विकृतवातादि धातूंची म्हणजेच दोषांची कर्मे–वात**– कृशता काळेपणा. उष्ण व स्निग्ध द्रव्याची इच्छा इत्यादी. **पित्त**–मळ मूत्र डोळे त्वचा पिवळे होणे व थंड पदार्थांची इच्छा इत्यादी. **कफ**– मंद अग्नि तोंडाला पाणी सुटणे, आळस, जडपणा, उष्ण व रूक्ष पदार्थांची इच्छा इत्यादी. दोषांचे सामान्य उपचार–क्षीण दोष वाढवावे, थोडे वाढलेले दोष शमवावे, कमी करावे. फार वाढलेले दोष रेचक वामक (वांतीचे) द्रव्यांनी काढून टाकावे. सम असले म्हणजे धातु स्वरूपात असले तर त्यांचे पालन करावे. दोषाचा संचय होताच त्याला जिंकावे. सर्व दोष प्रकुपित झाले तर बलवानाला प्रथम जिंकावे. शरिरातील विकृत वात पित्त कफ दोषांना क्रमाने बस्ति रेचक वांती व तेल तूप मध हे सर्वश्रेष्ठ उपचार आहेत.

**रोगः** ( चवि. ६.४; सुसू. ४१.१० ) रोग.
**प्रमादः** ( चवि. ८.५४ ) अपराध.

**(दोषा)**–स्त्री., वनस्पति० **हरिद्रा** ( र. २८.८९ ) हळद.

**–कर्मजव्याधि**–पु., रोगप्रकार० **अल्पके हेतौ महारम्भो व्याधिर्दोषकर्मजः** ( अहृसू. १२.५८ ) कारणे थोडी व किरकोळ पण रोगाची सुरवात मात्र जोरात होते तो दोषकर्मज रोग.

**–कृतदुष्टि**–( परिव० ) स्त्री., **दोषैः कृता दुष्टिः** ( असंसू. १९.१९ ) दोषांनी केलेली दुष्टी.

**–कोपकारण**–न., **दोषाणां कोपहेतुः, असात्म्यैरर्थैः संयोगः, कालो दुष्कृतं कर्म चेति त्रीणि कारणानि 'कालार्थकर्मणां योगो हीनमिथ्यादिमात्रकः' इत्यनेनाऽपि दोषाणां कोपकारणानि उक्तानि स्फुटम्** ( अहृसू. १२.३५ )
दोषांच्या प्रकोपाची व वृद्धीची ३ कारणे. १ आत्मसात् होऊ न शकणाऱ्या द्रव्यांचे व इंद्रियांच्या विषयांचे सेवन. २ विकृत काळाचा ( ऋतूचा ) परिणाम व ३ शरिराला न मानवणारे कर्म करणे काल, इंद्रियाचे विषय व कर्म यांचा शरिराचे गरजेइतकाच संबंध न येता कमी अधिक किंवा अव्यवस्थित खोटा संबंध येणे ही दोषाच्या प्रकोपाला कारणे होतात.

**–क्षयविकार**–पु., **वातादिदोषाणां क्षयादुद्भूतो विकारः, यथा क्षीणो वायुः प्रसेकारुचिहृल्लासादीन् करोति। स्तम्भशैत्यानियततोददाहारोचकादींश्च पित्तम्। श्लेष्मा च भ्रमोद्वेष्टनाऽनिद्राऽङ्गमर्दपरिशोषादींश्च करोति** (असंसू. १.९९–११)
दोषांच्या क्षयाने होणारे विकार–वायु क्षीण झाला तर तोंडाला पाणी सुटणे चव नसणे घशाशी येणे इत्यादी. पित्त क्षीण झाले तर–ताठरपणा थंडावा टोचणी आग व चव नसणे इत्यादी. व कफ क्षीण झाल्यास भ्रम पिंढऱ्या, व इतर अवयव दुखणे झोप अंग दुखणे तोंड सुकणे इत्यादी.

**–घातिन्**–वि., **दोषघ्नं हिक्काच्छर्द्यादिरोगघ्नं च** ( अहृसू. ६.१२६ ) दोषघातक. दोषनाशक. उचकी, वांती इ० रोगनाशक.

**–घ्न**–वि., **रोगहरम्** ( सुसू. ३४.२३ )
रोगनाशक, दोषनाशक.

**–चय**–पु., **दोषाणां स्वधाम्नि वृद्धिः** ( असंसू. ५ )
दोषाची स्वतःच्या घरात–स्थानात वाढ होणे.

**–दुर्बल**–वि., **दोषैर्दुर्बलो तैर्व्याधितो वा** ( सुसू. ३९.११ ) दोषांनी दुबळा झालेला, रोगयुक्त.

**–धातुभिषग्जित**–न., **यद्विकृतं दोषं धातुं चैककालं साम्यावस्थां नयति तत् भेषजादि** (चचि. ३०.१५१)
विकृत दोष व धातूंना एकाच वेळी समावस्थेत आणणारे औषध, अन्न आणि विहार.

**–धातुमलक्षयवृद्धिविज्ञानीय**– वि., **अध्याय०** (सुसू.१५)
अध्यायाचे नाव. यात दोष धातु व मल यांचे क्षय वृद्धि यांची माहिती आहे.

**–नाशन**–वि., **दोषशामकत्वेन दोषनाशनम्** ( चचि. १६.१२२ ) दोषशामक, दोषनाशक.

**–निबद्धायुस्**–वि., **मलादिरूपे देहस्थे दोषे निबद्धमायुर्यस्य** ( चसि. १०.१२ )
ज्याचे आयुष्य शरिरांतील दोषांना बांधले आहे, त्यांवर अवलंबून आहे असा. मलादि स्वरूपात पोचलेल्या दोषावर आयुष्य अवलंबून असलेला.

**–निर्हरण**–(परिव०) न., **दोषाणां वमनविरेचनादिना शोधनम्** ( सुचि. ३३.५० )
वामक रेचक इत्यादींनी दोष बाहेर काढणे.

**–पचन**–न., **दोषाणां निरामावस्थाऽऽपादनम्** ( असंचि. १ )
**अत्रप क्वस्याऽपि दोषस्य लङ्घनादिना पाचनं सङ्ग्रहनिनीषया कार्यमिति ज्ञेयम्** ( अहृसि. १.१०३ ) **तथैव ' धातवो हि धात्वाहाराः प्रकृतिमनुवर्तन्ते' इत्यनेन चरकवचनेन दोषाणां पचनं प्रसादस्तरादिपर्यवसितमुक्तमेवेति अनुसन्धेयम्।**
दोष निराम होणे, पक्व दोषांचे पाचन. अतिसारात दोष पक्व असले तरी ते लंघन इत्यादींनी पचन करून अतिसार कमी करावा लागतो. धातू हे धातूंचा आहार करितात व आपली समावस्था प्राप्त करून घेतात. दोषांच्या पचनाने प्रसाद प्रसादतर अंश यांत ते पर्यवसित होतात.

**–परिप्लुति**–स्त्री., **दोषस्य समन्तादागमनम्** ( सुउ. १७.८२ ) दोष भोंवताली संचित होणे.

**–पाक**–पु., **दोषस्य पक्वता तल्लक्षणम् –'दोषप्रकृतिवैकृत्यं ज्वरदेहयोः लाघवम् इन्द्रियवैमल्यं च'** ( मानि. मधु. चक. १२.६५; अहृनि. २.३३ )
दोषांचा पाक. पक्वता. रोगात दोषाच्या प्रकृतीप्रमाणे

गुणधर्माप्रमाणे शरीर बनते. ते बदलणे, शरीर तापही हलका होणे आणि इंद्रिये निर्मल होणे.

**–पाचन**–वि., **आमसंसृष्टानां दोषाणां पाचकम्** ( सुसू.३८.२८ )
आमयुक्त दोषांचे पचन करणारे.

**–प्रकृति**–स्त्री.. **दोषस्वभावः** ( सुसू. ६.१९. )
दोषस्वभाव, दोषगुणकर्मे.
**तस्य तस्य दोषस्याऽऽधिक्येन संजाता प्रकृतिः** (चवि. ६.१३)
त्या त्या दोषाच्या आधिक्याने होणारी प्रकृती.
**येन दोषेण गर्भोऽनुबध्यते तेन दोषेण आरब्धा प्रकृतिर्दोषप्रकृतिरुच्यते** ( चवि. ८.९५ )
ज्या दोषाचे आधिक्य गर्भशरिरात होते त्या दोषाने बनलेली प्रकृती दोषप्रकृति होय.
वि., **व्याधिः दोषो नाम दोषवैषम्यं एव प्रकृतिः कारणं हेतुर्वा यस्य सः ( व्याधिः )** (चवि. ६.४)
रोग. दोष दोषांची. विषमता हेच कारण ज्याचे तो रोग.

**–प्रकृतिवैकृत्य**–न., **उच्छ्रिताया दोषप्रकृतेरन्यथात्वम्** ( सुउ. ३९. ११६ )
रोगात दोष वाढतात, त्यांचे गुण व त्यांची कर्मे शरीरावर व्यक्त होतात. म्हणजे शरीर दोषप्रकृतीचे बनते व ती प्रकृती वाढलेल्या उग्र स्वरूपाची असते. हे स्वरूप बदलणे, दोषाच्या प्रकृतीची गुणकर्मे नाहीशी होणे म्हणजे दोषप्रकृतीची विकृति होणे होय.

**–प्रच्यावन**– न., **उपक्रम० दोषाणां प्रकर्षेण निर्हरणम्** ( सुचि. १. १२७ )
उपचार. दोष अधिक प्रमाणात बाहेर काढणे.
**विरेचनम्** ( सुसू. ३९. ११ ) रेचक. ढाळक.

**–प्रतिपक्ष**–वि., **दोषविपरीतम्** ( असंसू. ३६ )
दोषाच्या गुणकर्मांच्या उलट गुणकर्मांचा.

**–प्रभाव**–पु., **दोषस्य कार्यविशेषकारित्वम्**, ( चवि. १.१२ )
दोषांचे विशिष्ट कार्य करण्याचे सामर्थ्य.

**–प्रमाण**–न., **वातादेरल्पाऽनल्पादिपरिमाणम्** ( चवि. ४.८ )
वातादि दोषांचे कमी जास्त प्रमाण.

**–प्रशमन**–वि., **दोषशामकम्, लङ्घनादिना (द्रव्यम्)**, ( चसू. १.६७ )
लंघन इ० द्वारे दोषाचे शमन, शामक द्रव्य.

**–बलप्रवृत्त**–वि., **दोषा वातादयो रजस्तमसी च। तेषां बलं शक्तिः, तत्प्रवृत्तो व्याधिः। स च पक्वाऽऽमाशयसमुत्थभेदाद्द्विविधः।**
**पुनश्च शारीरमानसभेदाद्द्विविधः** ( सुसू. २४.५ )
दोषाच्या शक्तीने उत्पन्न झालेला रोग. दोष– वात इत्यादी व रज आणि तम. यांच्या सामर्थ्याने उत्पन्न झालेले रोग. यांचे दोन प्रकार–आमाशयातून होणारे; पक्वाशयातून होणारे. आणखी दोन प्रकार–शारीरिक व मानसिक.

**–बहुल**–वि., **मलरूपपुरीषादिबहुलम्, पुरीषादिबहुलम्**, ( सुउ. ४०.१३० )
मलरूप मळमूत्रादि पुष्कळ असलेले. दोषांचे प्रमाण पुष्कळ असलेले.

**–बीज**–न., **दोष एव बीजम्** (असंनि. २.६७)
दोष हेच बीज.

**–भक्षित**–वि., लक्षण० **वातादिदोषैराक्रान्तम्, पूयभक्षितम् ( मांसादि )** ( अहृसू. २९.७ )
वातादि दोषांनी आक्रमिलेले. पुवाळलेले, दोषांनी खाल्लेले. मांसादि धातूंही सडलेले पुवाळलेले.

**–भेद**–पु., **दोषप्रकारः, वृद्धिक्षयसाम्यविभेदतो दोषभेदस्त्रिधा** ( असंसू. १.२३ )
दोषांचे प्रमाणानुसार प्रकार तीन. सम, वाढलेले व क्षीण ( क्षय झालेले ).
**त्रिदोषाणां परस्परमेलनेन संभूतः संसर्ग० दोषभेदास्त्रिषष्टिः, ते एवम्– एकशः षट्, द्विशः पञ्चविंशतिः, त्रिशश्च द्वात्रिंशत्** ( सुउ. ६६.४ )
तिन्ही दोषांच्या परस्पर मिश्रणाने झालेले प्रकार ६३. यांना संसर्गही म्हणतात. एकेक दोषाचे मिश्रण प्रकार सहा, जोडीने मिश्रण प्रकार पंचवीस, त्रिकूटाचे ३२, असे ६३.

**–भेदविकल्प**–पु., **अध्याय०** (सुउ. ६६.१)
दोषप्रकार, कल्पना. अध्यायाचे नाव. दोषांच्या प्रकारांचे एकेक दोन दोन इ० प्रकारांच्या कल्पना.

**–भेदीय**–वि., **अध्यायविशेषः** (असंनि. १५)
अध्यायाचे नाव. यात दोषाचे प्रकार सांगितले आहेत.

**–लक्षण**–न., **वातादिदोषाणां रूक्षशीतत्वादिलक्षणानि** (अहृसू. १२.५४)
दोषाचे लक्षण. जसे वात रूक्ष शीत इ. गुणांचा आहे.

**–लिङ्ग**–न., ( परिव० ) **वातादिदोषलक्षणम्** (सुउ.
वात इत्यादी दोषांचे लक्षण, ओळखण्याचे

**–वक्तृ**–वि., **देवद्विजगुरूणां दोषोद्घाटकः निन्दकः** ( सुउ. ६०.९ )
दोष बोलणारा, दोष काढणारा. निंदक. देव ब्राह्मण गुरुचे दोष सांगणारा.

**–वती**–स्त्री., **विरुद्धधर्मयोरेकत्रसमावेशरूपदोषयुक्ता** ( चवि. ६.४ )
परस्परविरुद्ध धर्मांची द्रव्ये एकत्र मिश्रण करणे या दोषाने युक्त असलेली.

**–वर्जित**–वि., **कृमिविषशस्त्राद्युपघातादिदोषैरत्यक्तम्** ( सुसू. ३६.१३ )
कृमि विष शस्त्रादिकांचा आघात इत्यादी दोष असलेली द्रव्ये.

**–वाहिस्रोतस्**–न., ( परिव० ) **स्रोतो० वातादिदोषवाहकं स्रोतः, समानवायोः स्थानमेतत्** ( चचि. २८.८ ) वातादि दोष वाहून नेणारे स्रोतस. समान वायूचे एक स्थान.

**–विकल्पविद्**–वि., **दोषाणां विकल्पस्य ज्ञाता** ( चसू. २६-२७ ) दोषांचे प्रकार जाणणारा,

**–विग्रथित**–वि., **दोषमिश्रितम्** ( सुचि. ३४.६ )
दोषमिश्रित. दोषयुक्त.

**–विभ्रान्तचेतस्**–वि., **रोग० दोषवृध्या विभ्रान्तं चेतो यस्मिन्, स उन्मादः** ( चक्र.चक. १०.५ )
दोष वाढल्यामुळे ज्यात मन भ्रमिष्ट झाले आहे असा रोग. उन्माद.

**–विष**–न., **दोष एव विषम्** ( असंनि. २.६८ )
दोष हेच विष. दोषरूपी विष.

**–वृद्धिविकार**–पु., **वातादिदोषवृद्ध्या जायमानो व्याधिः** ( असंसू. २०.३७ ) **ते च व्याधयः कार्श्यकार्ष्ण्यादयो वातस्य, पीतत्वग्ग्लानीन्द्रियदौर्बल्यादयः पित्तस्य, श्वैत्यशैत्यादयश्च कफस्येति** ( असंसू. १९.६ )
दोषांच्या वाढीने होणारे रोग. कृशता काळेपणा इत्यादी वाताचे; पिवळी कातडी गळाल्यासारखे वाटणे इंद्रियांची दुर्बलता इत्यादी पित्ताचे; व पांढरेपणा थंडावा इत्यादी कफाचे विकार होत.

**–वेग**–पु., **दोषगतिः** ( चचि. १०.८ )
दोषांचा आवेग, दोष उचंबळणे, एकदम वाढ होणे, दोषांचे आक्रमण, हल्ला.

**–वेगोदय**–पु., **दोषवेगवृद्धिः** ( असंसू. ३२.६ )
दोषांच्या आवेगाचा–आक्रमणाचा आरंभ दिसू लागणे.

**–वैषम्य**–न., **दोषविकृतत्वम्, दोषाणां प्राकृतप्रमाणन्यूनत्वं प्रमाणाधिक्यं वा चयप्रकोपप्रभृतिरोगावस्थारूपमनुसंधेयम्** ( असंसू. १.४३; अहृसू. १.२० )
शरिराला आवश्यक प्रमाणापेक्षा दोष कमी किंवा अधिक होणे. दोष विषम होणे. चय प्रकोप इत्यादी रोगावस्थानुरूप समजावे.

**–शमन**–वि., **दोषशामकम्** ( **लङ्घनादिना** ), **दोषप्रशमनम्** ( सुसू. ४६.४३७ )
दोषशामक. दोष कमी करणारे लंघन इत्यादी.

**–शमनत्व**–न., **दोषशमनसामर्थ्यम्** ( असंसू. १२ )
दोषशामक सामर्थ्य, दोषांचे शमन करण्याचे सामर्थ्य.

**–संघात**–पु., **दोषाणां मेलनम्** ( चक. १.५ )
दोषांचा मेळा, दोषांचे मिश्रण -समूह.

**–संघातभेदन**–वि., **दोषसमूहपृथक्करणम्** ( सुसू. ४६.४३६ )
दोषांचे मिश्रण संयोग विरळ करणे, पृथक् करणे.

**–समता**–स्त्री., **दोषसाम्यम्** ( सुनि. १.१० )
शरिराला आवश्यक तितकेच दोष असणे. सम असणे. दोषांचे साम्य.

**–समुच्छ्रिति**–स्त्री., **दोषाणामौत्कट्यम्, एकस्य द्वयोस्त्रयाणां वा प्रकर्षः** ( सुचि. ६.२१ )
एक, दोन अथवा तीनही दोषांचे उत्कटत्व–आधिक्य दोष उचंबळणे.

**–साम्य**–न., **वातादिदोषाणां समत्वं–प्रकृतिस्थत्वम्, दोषाणां स्वरूपादप्रच्युतिः** ( अरु. ) **अविकृतत्वम्** ( हे. अहृसू. १.२०; असंसू. १ )
शरीर आरोग्यसंपन्न असण्याकरिता वातादि दोषांची जितक्या प्रमाणात आवश्यकता असते तितके दोष असणे. दोष सम असणे. अविकृतत्व. स्वप्रमाण न ढळणे. नैसर्गिक प्रमाण, प्राकृत अवस्था.

**–स्थान**–न., **प्राकृतदोषसंश्रयस्थानम्** ( सुसू. २१.६; अहृसू. १२.१८ ) **तदपि पूर्वरूपावस्थायां विकृतत्वेन दोषाणां स्थानसंश्रयः** ( सुसू. २१.३३ )
दोषांचे स्वाभाविक नेहमीचे आश्रयस्थान. अविकारी दोषाचे नेहमीचे आश्रयस्थान. पूर्वरूपावस्थेत विकृत दोष शरिरात जेथे जाऊन रोग निर्माण करतात तेही एक दोषस्थान होते. येथील दोषांच्या आश्रयाला स्थानसंश्रय म्हणतात.

**-स्यन्द**-पु., उपक्रम० **रक्तपिच्छादिदोषाणां निर्हरणम्** ( असंशा. ५.४६ )
दोषांचे निर्हरण, रक्त, पिच्छा, इ० दोषांना बाहेर काढणे.

**-स्रोतस्**-न. स्रोतो० **दोषवहस्रोतः**, (सुउ. ३९.१०७) **दोषश्च स्रोतश्चेति** ( सुउ. ३९.१०७ )
काही स्रोतसे, वाहिन्या. दोष वाहणारे स्रोतस-वाहिनी. दोषवहस्रोतस.

**-स्वभाव**-पु., **दुष्टीकरणस्वभावः** ( चशा. ६.१८ )
दोषांचा स्वभाव. दूषित करणे हा स्वभाव.

**-हर**-न., उपक्रम० **शोधनम्** (ड. सुउ. ४२.१४० )
दोषहरण. एक उपचार. दोषांची शुद्धि करणे. दोष बाहेर काढणे.

**-हरण**-न., उपक्रम० **शोधनम्** (अहृचि. १.१०३)
पहा 'दोषहर.'

**-हारिन्**-पु., वनस्पति० **अशोकः** ( रा. १०.२७१ )
अशोक.

**दोषल**-वि., **दोषजनकम्** ( सुशा. १०.३२ ) **आमसंचयकारि** ( हे. अहृसू. ५.४१ )
दोषजनक, दोष वाढविणारे, आमाचा साठा करणारे.

**दोषाग्नि**-पु., **दोष एवाग्निः** ( सुचि. १.१८ )
दोष हाच अग्नि.

**दोषानद्ध**-वि., **आमदोषव्याप्तम्** ( सुचि. १.१२ )
दोषाने व्याप्त, आमदोषाने पूर्ण.

**दोषानुकर्षिणी**-वि., **दोषनिर्हरणी ( मात्रा )** (चसू. १३.२४) दोष बाहेर काढणारी. दोषहारिणी मात्रा.

**दोषानुगमन**-न., **संसृष्टेषु प्रधानदोषस्याप्रधानदोषेण अनुसरणम्** ( असंनि. ३ )
दोन दोष प्रकुपित झाल्यानंतर मुख्य दोषाचे गौण दोषाने केलेले अनुसरण अनुवहन. मुख्य दोषाच्या मागाहून ( मागोमाग ) जाणे.

**दोषानुपशयित**-वि., **दोषाजातम्** ( असंशा. ८ )
दोषामुळे झालेले, दोषांपासून झालेले.

**दोषानुशयिता**-वि., **उल्बणवातादिभाविताऽव्यभिचारिणी ( प्रकृति. )** ( चक्र. चसू. ७. ४० )
वाढलेल्या वातादिकांचा संस्कार ( आजन्ममरण राहणारा ) असलेली प्रकृति. वातादिकांच्या गुणकर्मांचा आजन्ममरण राहणारा संस्कार झालेली प्रकृति.

**दोषापकर्षण**-न., उपक्रम० **दोषाणां संशोधनम्** ( चवि. ७.३३ )
दोष बाहेर काढणे, रेचक वामक इ० शोधने.

**दोषाप्रवृत्ति**-स्त्री., लक्षण० **वातादीनां निश्चलता** ( ड. सुउ. ३९.११७ )
दोषांची निश्चलता, स्तब्धता, गतिहीनता, अचलता.

**दोषावसेचन**-न., उपक्रम० **अपतर्पणभेदः शोधनम्** (चवि. ३. ४३; असंसू. ११. ४६ )
शोधन, दोष बाहेर काढणे. लंघनाचा प्रकार.

**दोषाशय**-पु., **दोषाणां ( विकृतिजनकत्वेन ) संश्रयस्थानम्** ( चचि. १३. ११८ )
विकृति निर्माण करणाऱ्या दोषांचे स्थान.

**दोषोच्छ्रय**-पु., **दोषोद्रेकः** ( सुउ. ३९.२०२ )
दोषांची वाढ, दोष उचंबळणे.

**दोषोच्छ्राय**-( पु., ) **दोषास्यौत्कट्यम्** ( सुचि. १.१२ )
दोषांची वाढ, दोष उत्कट होणे.

**दोषोत्क्लेश**-पु., **दोषस्थो विक्लेदनलक्षण उत्क्लेशः** ( ड. सुचि. ३७.४७ )
वातादिक दोषाचा क्षोभ, प्रकोप, दोषातील आर्द्रस्वभावी घटक उचंबळणे.

**दोषोत्क्लेशिन्**-पु., वनस्पति० **वनबर्बरिकाभेदः** ( ध. ४.५८ ) द्र० '**बर्बर**' रानबाभूळप्रकार.

**दोषोत्थ**-वि., **कुपितदोषसमुत्पन्नो व्याध्यादिः** ( अहृसू. १२.५८ )
प्रकुपित दोषापासून झालेला रोग.

**दोषोदर**-न., रोग० **दोषजन्यमुदरम्** ( चसू. १.१०१ )
दोषजन्य उदर, दोषज उदर.

**दोषोद्रेक**-पु., **दोषस्याऽऽधिक्यम्** (असंसू. २९)
दोषाचे आधिक्य, दोष एकदम वाढणे.

**दोषोपचय**- पु., **दोषपुष्टिः** ( सुसू. ६.१० )
दोषांची पुष्टि. दोषांची वाढ.

**दोषोपप्लवविशेष**- पु., **दोषाणां विशिष्टा दुष्टिः, स पञ्चदशप्रकारकः, वातपित्तश्लेष्मशोणितान्येकशो द्विशस्त्रिशः सर्वशश्चेति संकरेण पञ्चदशप्रकाराणि । शुद्धत्वात् षोडशप्रकार इत्येके इति व्रणाधिकारे** ( सुचि. १.५; सुसू. २१.२८ )
दोषांची विशिष्ट दुष्टि. प्रकार १५. वात पित्त कफ व रक्त यांची एकेकटी, दोहोदोहोंची तिघातिघांची व सर्वांची अशी एकमेकांचा संकर होऊन पंधरा प्रकार होतात, सर्व शुद्ध असण्याचा एक प्रकार असे

१६ प्रकार असे एक मत. असे व्रणाधिकारात म्हटले आहे.

**दोषोपलिप्तवदना**–स्त्री., सिरा० दोषव्याप्तमुखा सिरा (असंसू. ५)
दोषांनी लपेटलेले तोंड असलेली शीर.

**दोस्**–पु., न., शारीर० हस्तः (र. २३.७) हात.

**दोहद**–पु., गर्भिण्या इच्छा, दौहृदम्, तृतीये चतुर्थे वा मासि गर्भिणीनां जायमाना इन्द्रियार्थेष्वभिप्रायाः (चनि. ३.१४; र. २२.४५)
गर्भिणीच्या इच्छा. डोहाळे. तिसऱ्या चवथ्या महिन्यात गर्भिणीला उत्पन्न होणाऱ्या इच्छा.

**दोहन**–न., दोहनपात्रम्, दुहन्ति गां पयोऽस्मिन् दोग्धारः इति दोहनं दोहनपात्रमिति यावत् (सुचि. ३१.४२) दूध काढण्याचे भांडे, दूध काढणे.

**दौर्गन्ध्य**–न., लक्षण० दुर्गन्धित्वम् (चसू. ५.९३)
दुर्गंधीपणा. वाईट वास असणे.

**दौर्बल्य**–न., लक्षण० बलहीनता (चसू. १६.७; सुनि. ३.१६) शरीरबलहानिः मांसाऽपचयः (चनि. १.३३)
दुबळेपणा, दुर्बलता, बलहीनता, शरीरबलनाश, मांस क्षीण होणे, कृश होणे.

**दौर्बल्यता**–स्त्री., दुर्बलक्रियता, अत्र 'दुर्बलस्य कर्म' दौर्बल्यम्, तस्य भावो दुर्बलता, तेन पितुर्बीजस्य दुर्बलक्रियता (चशा. २.२०)
दुर्बल कर्म करणे; दुबळेपणा; दुर्बलाचे कर्म; दौर्बल्य त्याचे भाववाचक दौर्बल्यता, दुबळेपणा असणे. पित्याच्या बीजाच्या दौर्बल्यत्वाने संतती नपुंसक होते.

**दौर्मनस्य**–न., लक्षण० दुश्चित्तत्वम् (सुसू. २९.४५) दौर्मनस्यमवृष्याणां श्रेष्ठम् (चसू. २५.४०; असंसू. १३.३)
खिन्न मन असणे, मनाची खिन्नता; शुक्राला अहितकर अशा सर्वांत मनाची खिन्नता श्रेष्ठ आहे.

**दौर्हृद**–न., गर्भिण्या इच्छा, दोहदः. तन्निरुक्तिः– स्वहृदयं गर्भहृदयं चेति द्वे हृदये यस्याः सा द्विहृदया, तस्या इदं दौर्हृदम्। तद्धेतुः– प्राक्तनकर्मसंबन्धाद्दैवयोगाच्च दौर्हृदं हृदि जायते (सुशा. ३.२८) दौर्हृदकालः–पक्षत्रयात्प्रभृत्यापञ्चमान्मासाद्दौर्हृदकालः (इन्दु. असंशा. २.१५–१७.) गर्भस्वभावान्मातुश्चतुर्थादिमासेष्विन्द्रियार्थप्रार्थना (ड. सुसू. २४.५) प्राप्तदौर्हृदा गुणान्वितं सुतं प्रसूते। अलब्धदौर्हृदा त्वात्मनि गर्भे वा भयं लभेत (सुशा. ३.१९–२१) श्रद्धाविघाताद्गर्भस्य विकृतिश्च्युतिर्वा भवति (अहृशा. १.५४; असंशा. २.२०) प्रार्थनायां च तीव्रायां काममहितमप्यस्यै हितोपसंहितं दद्यात्। श्रद्धाविघातस्तु न करणीयः (असंशा. २.१९) येषु येष्विन्द्रियार्थेषु दौर्हृदविमानना भवेत् तस्मिन् तस्मिन्निन्द्रिये सुतस्यार्तिः प्रजायेत (सुशा. ३.१९–२१) दौर्हृदेऽवमानिते वातप्रकोपेण गर्भः कुब्जः कुणिः पङ्गुर्मूको मिम्मिणो वा भवति (सुशा. २.५१) राजसंदर्शनविषये दौर्हृदे सत्यर्थवन्तं महाभागं कुमारं सूते। तथा दुकूलपट्टादिविषयेऽलङ्कारैषिणं ललितं च, आश्रमे संयतात्मानं, देवताप्रतिमायां पार्षदोपमं, व्यालादिदर्शने हिंसाशीलं, गोधामांसाशने सुषुप्सुम्, गोमांसे बलिनं, माहिषे शूरं रक्ताक्षं लोमसंयुतम्, वाराहे स्वप्नालुं शूरम्, मृगमांसाद्वनचरं जङ्घालम्, सृमराद्विग्नमनसम्, तैत्तिरान्नित्यभीतं सुतं सूते। यथा समभिध्याति सा तथा शरीराऽऽचारशीलैः समानं सुतं जनयति (सुशा. ३.१८–२७)
डोहाळे–गरोदर स्त्रीच्या इच्छा, जिला स्वतःचे व गर्भाचे अशी दोन हृदये ती द्विहृदया दोन हृदयी. तिच्या ज्या इच्छा त्या दौहृदम् डोहाळे. डोहाळ्यांचा काळ– तीन पंधरवड्यानंतर पांचव्या महिन्याअखेरचा काळ. गर्भस्वभावामुळे चवथ्या महिन्यापासून आईला निरनिराळ्या इंद्रियांच्या इच्छा होतात. डोहाळे पुरवले गेले तर गुणसंपन्न मूल होते. डोहाळे पुरवले गेले नाहीत तर गर्भिणी किंवा गर्भ यात विकृति होते, गर्भपातही होतो. ज्या ज्या इंद्रियाच्या विषयावर गेलेली इच्छा पुरी केली जात नाही त्या त्या इंद्रियात गर्भाला विकृति होते. वातप्रकोप होऊन गर्भ कुबडा, वाकड्या हाताचा, पांगळा, मुका गेंगाणा बोलणारा इत्यादी प्रकारच्या वैगुण्याचा होतो.

राजाच्या दर्शनाची इच्छा झाली व ती पुरवली गेली तर श्रीमंत, मोठ्या भाग्याचा; अलंकार रेशमी तलम कपड्यांची इच्छा असलेलीला, विलासी होतो. गर्भिणीला आश्रम पाहण्याची इच्छा झाली तर

मनोनिग्रही; देवदर्शनेच्छूला सभापति; वाघादिकांना पाहूं इच्छिणारीला हिंसक; घोरपडीचे मांस खाऊ इच्छिणारीला झोपाळू; गोमांस इच्छिणारीला बलवान्; रेड्याचे मांस इच्छिते तिला शूर, लाल डोळ्याचा, केसाळ; डुकराचे मांस हवे असणारीला शूर पण झोपाळू; हरिणमांस हवे असणारीला उद्योगी व वेगवान्; मोठा डुक्कर इच्छिणारीला चंचल मनाचा; तित्तिराची इच्छा असणारीला भितरे मूल होते. गर्भिणीच्या मनापुढे जे येईल त्या शरीर मन आचार शील यांप्रमाणे मुलाच्या शरीरादिकांचे गुण होतात.

**-विमानन**-न., **गर्भिण्याः श्रद्धाविघातः**
( सुशा. ३.१८; असंशा. २. २० )
डोहाळे पुरे न करणे. गरोदर स्त्रीच्या इच्छा पुऱ्या न करणे.

**(-विमानना)**-स्त्री., **दौर्हृदखण्डितत्वम्**
( सुशा. ३.२१ ) डोहाळे पुरे न करणे.

**दौर्हृदावमानन**-(परिव०) न., **गर्भिणीश्रद्धाया असम्पूर्तिः**
( सुशा. २.५१ ) डोहाळे पुरे न करणे.

**दौर्हृदिनी**-स्त्री., **द्विहृदया नारी** ( सुशा. ३.१८; असंशा. २०.१७ )
दोन हृदये असलेली स्त्री. स्वतःचे व बालकाचे अशी दोन हृदये असलेली स्त्री.

**द्यूत**-पु., न., **क्रीडा० पाशकादिक्रिया, कैतवम्**
( सुचि. २४.१०१ )
फाशाने खेळणे, पैज, जुगार.

**द्यो**-स्त्री., **स्वर्गलोकः** ( सुचि. ३०.३ ) स्वर्गलोक.

**द्रङ्क्षण**-न., **मान० शाणद्वयम्, 'शाणौ द्वौ द्रंक्षणं विद्यात्'** ( चक. १२.८९ ) **कोलम्, तोलकार्धम्** ( र. २०.३६ ) अर्धा तोळा.

**द्रव**-पु., **आप्यो गुणः सान्द्रविपरीतः**
( चशा. ६.१०; सुशा. १.१९ ) **तस्य कर्म प्रक्लेदनम्** ( सुसू. ४६.५२० ) **उदकधातुः** ( सुउ. ४०.१२५. )
जल या महाभूताचा गुण. सांद्र—सरबरीतच्या विपरीत. त्याचे आर्द्रता उत्पन्न करणे हे कार्य. शरिरातील जलधातु.
न., **आहारद्रव्य० तक्रभेदः, मथितम्** ( ध. ६.१८९ )
आहारद्रव्य. ताकाचा प्रकार, घुसळलेले दही.
वि., **द्रुतिमद्द्रव्यम्** ( सुशा. १.१९ )
पातळ होणारे द्रव्य.

**-ता**-स्त्री., **द्रवभावः** ( सुसू. १४.९ )
पातळपणा, द्रवत्व.

**-द्रव्य**-न., **जलीयं द्रव्यम्, तोय-क्षीर-दधितक्रेक्षुरसादि** ( अहसू. ५.१ )
पातळ द्रव्य. पाणी, दूध, दही, ताक, उसाचा रस इत्यादी.

**-द्रव्यविज्ञानीय**-पु., **अध्याय०** ( अहसू. ५ )
अध्यायाचे नाव. द्रव द्रव्याबद्दलची माहिती यात आहे.

**-धातु**-पु., **द्रवत्वगुणयुक्तो धातुः** ( चचि. १५.२४ ) **धातोर्द्रवरूपोंऽशः** ( चचि ४.८ )
द्रवगुणाचा – पातळ धातु – शरीरघटक – धातूचा द्रवरूप अंश.

**-रसा**-स्त्री., **भैषज्य० लाक्षा** ( रा. ६.१४२ ) लाख.

**-स्वेद**-पु., **स्वेद० द्रवद्रव्यैः स्वेदः, स द्विविधः परिषेकावगाहभेदात्** ( सुचि. ३२.३ ) **तद्विधिः – वातहरद्रव्यक्काथपूर्णे कोष्णकटाहे द्रोण्यां वाऽवगाह्य स्वेदयेत् । एवं पयोमांसरसयूषतैलधान्याऽम्लघृतवसामूत्रेष्ववगाहेत्सुखोष्णैः कषायैश्च परिषिञ्चेत्** ( सुचि. ३२.१३; असंसू. २६.६; अहसू. १७.१ )
**द्र० ' स्वेद '**
ओला शेक. शेकण्याचा प्रकार, ओल्या द्रव्यांनी शेकणे. दोन प्रकार - १ शिंपडणे व २ द्रवात - गरम औषधी पाणी काढा तेल इत्यादींमध्ये बसणे; तो तो अवयव त्यात बुडवणे. वातहारक द्रव्यांच्या गरम काढ्यात बसून शेकणे. याप्रमाणेच गरम दूध मांस मांसरस कढण तेल कांजी तूप चरबी मूत्र यात बसणे व तो तो अवयव बुडवून शेक देणे. याच कोमट द्रव्यांनी शिंपडणे.

**द्रवन्ती**-स्त्री., **वनस्पति० सुतश्रेणी** (रापरि. ४.१६)
रानहरभरा.
**आखुकर्णी** ( रापरि. ३.२१ ) **आखुपर्णिका, मूषिकपर्णी,** ( सुउ. ५२.२०; असंउ. १० ) उंदीरकानी.
**समुद्रैरण्डः** ( इन्दु. असंउ. १० ) **चीरितपत्रा, दन्तीभेदः, फलमस्या विरेचने उपयुज्यते**
(चसू. २.१०, १.७८; चक. ११.१३; सुउ. ४२.६३)
**द्रवन्तीगुणाः– मधुरा शीता रसायनी रसबन्धनी त्रिदोषघ्नी ग्रहणी-तृष्णा-ग्रन्थि-प्रमेह-जठर-गर-पाण्डु--कृमिकोष्ठ-भगन्दर-हृद्रोग-कृमि-ज्वर-शूलशमनी च** ( ध. १.२२९; चक. ११.१३. )
हिं.–बडी दन्ती.
**म.–थोरदांती, मोगली एरंड.**

गु.—मोटो नेपालो, रतनजोत.
बं.—सांबरी, बृहद्दन्ती.
त.—कटलामणक्कु.
फा.—दंतीनाहरी.
मोगली एरंड. फळ रेचकाकरिता उपयुक्त.
मोगली एरंडाचे गुण—गोड थंड रसादिधातूंची परिपोषक. पाऱ्याची गोळी करणारी त्रिदोषनाशक ग्रहणी तृष्णा उदर कृत्रिम विष कृमि भगंदर प्रमेह पांडु ज्वर शूलनाशक.

**–स्नेह**–पु., **स्नेह० शम्बरीतैलम्, तद्गुणाः–तिक्तकटुकषायोऽधोभागदोषहरः कृमिकफकुष्ठाऽनिलहरो दुष्टव्रणशोधनश्च** (सुसू. ४५.१२४)
मोगली एरंडाचे तेल. कडु तिखट तुरट. खालच्या कोठ्यातील दोष नाशक, वात कफ कृमि कुष्ठहारक. दुष्ट व्रण शोधन करणारे.

**द्रविड**–पु., **देश० दाक्षिणात्यजनपदः**
(इन्दु. असंशा. १२.१२; काखिल. २५.१३)
देश. दक्षिणेतील प्रांत द्राविडांचा प्रदेश.

**(द्रविडी)**–स्त्री., **वनस्पति० एला** (असंचि. ४)
वेलदोडा,

**द्रवोत्तर**–वि., **द्रवाढ्यं द्रवप्रधानं भोजनादि**
(सुसू. ४६.४१०)
पातळ जेवण, पेय, पातळ अन्नपान. घनांशापेक्षा द्रवच अधिक असलेले.

**द्रव्य**–न., **षट्सु पदार्थेष्वेकम्** (चसू. १०.२८) **वैशेषिकसंमतसप्तपदार्थेष्वेकम्** (चवि. ८.२७) **आधारकारणम्** (चसू. १.६४) **तल्लक्षणम्–क्रिया–गुणवत्समवायिकारणम्**
(चसू. १.५१; सुसू. ४०.३)
**आहारभेषजादि सर्वं द्रव्यं पञ्चभूतात्मकम्, तथात्वेऽपि भूयसा व्यपदेशादाकाशीयवायवीयतैजसाप्यपार्थिवभेदात्पञ्चविधम्, तत्र–आकाशीयं श्लक्ष्णसूक्ष्ममृदुव्यवायिविशदविविक्तमव्यक्तरसं शब्दबहुलं मार्दवसौषिर्यलाघवकरं च, वायवीयं सूक्ष्मरूक्षादिगुणं वैशद्यादिकरं च, तैजसमुष्णतीक्ष्णादिगुणं दहनादिकरं च, आप्यं शीतस्तिमितादिगुणं स्नेहनह्लादनादिकरं च, पार्थिवं स्थूलसारसान्द्रादिगुणं स्थैर्यबलादिकरं च** (चसू. २६.११; सुसू. ४१.३४; अहसू. ९.५-९)
**तच्च पुनः सचेतनाचेतनभेदेन द्विधा** (चसू. २६.१०; सुसू. १.२८) **विचित्रप्रत्ययारब्धसमानप्रत्ययारब्धभेदेन द्विधा, विचित्रप्रत्ययारब्धं यवादि समानप्रत्ययारब्धं गोधूमादि च** (अहसू. ९.२७-२८) **भौममौद्भिदं जाङ्गमं चेति त्रिधा** (असंसू. १२.३) **शमनकोपनस्वस्थहितभेदेन त्रिधा** (असंसू. १.३७) **ऊर्ध्वभागहर–अधोभागहर–उभयतोभागहरभेदात् त्रिधा, ऊर्ध्वभागहरं मदनफलादि, अधोभागहरं निकुम्भकुम्भादि, उभयतोभागहरं कोशातकीशङ्खिनीसप्तलादि** (सुसू. ३९.३-५) **मधुरादिरसभेदात् षट्प्रकारकं मधुराम्ललवणकटुतिक्त कषायाऽऽत्मकम्।**
**द्रव्यगुणाः–गुरुमन्दहिमस्निग्धश्लक्ष्णसान्द्रमृदुस्थिरसूक्ष्मविशदाः सविपर्यया लघुतीक्ष्णोष्णरूक्षखरद्रवकठिनचलस्थूलपिच्छिला दश गुणा गुरुमन्दादिविपरीताः क्रमशो ज्ञेयाः विंशतिः** (अहसू१.१८)
**द्रव्यवीर्यम्– गुरुस्निग्धहिममृदुलघुरूक्षोष्णतीक्ष्णभेदेनाष्टविधं** (अहसू. ९.१२-१३) **शीतोष्णवीर्येण द्विविधेति च** (अहसू. ९. १७)
**द्रव्यविपाकः– मधुराम्लकटुभेदात् त्रिविधः** (अहसू. ९. २१) **पाकस्य द्विविधत्वमेव सुश्रुतेन सिद्धान्तितं तद्यथा–'आगमे हि द्विविध एव पाको मधुरः कटुकश्च'** (सुसू. ४०. १०) **अत्रापि मधुरः पाके गुरुः कटुकश्च पाकतो लघुरिति गुरुलघुत्वं बोध्यं सुश्रुतानुसारेण**
**द्रव्यकर्म– वमनविरेचनबस्तिनस्यशिरोविरेचनानि पञ्चकर्माणि** (चसू. २६. १०) **बस्तिर्विरेको वमनं शिरोरेकोऽस्रविस्रुतिः** (अहसू. १४.७)
**द्रव्यस्य रसादिसाम्येऽपि विशिष्टं कर्म प्रभावः** (अहसू. ९. २६)
सहा पदार्थांपैकी एक. वैशेषिक मताने सात पदार्थांपैकी एक. आधाराचे कारण. द्रव्याचे लक्षण. गुण व कर्मवान् समवायी कारण. आहार औषधे इत्यादि सर्व पंचभूतात्मक द्रव्य होय. तसे असूनही ज्या महाभूताचे आधिक्य असेल त्या भूताचा उल्लेख केल्याने आकाशीय वायवीय आग्नेय जलीय पार्थिव असा भेद म्हणून पांच प्रकारचे. लक्षणे–गुण–कर्मे. **आकाशभूताधिक**–बुळबुळीत सूक्ष्म मऊ पचनापूर्वी शरीरात पसरणारे स्वच्छ विरळ अव्यक्त रसाचे शब्दबाहुल्याने असणारे. मृदुता हलकेपणा व पोकळी करणारे. **वायुभूताधिक**–सूक्ष्म रूक्षादि गुणाचे व स्वच्छ करणारे. **अग्निभूताधिक**–उष्ण तीक्ष्णादि गुणाचे, पचन

इत्यादी करणारे. **जलभूताधिक**–थंड ओले इत्यादी गुणांचे, स्निग्ध, आनंदी करणारे. **पृथ्वीभूताधिक**– स्थूल घन सरबरीत गुणाचे. स्थैर्य बल इत्यादी करणारे. **प्रकार दोन**–सचेतन अचेतन. पुन्हा (१) समान कारणांनी झालेले गहू इत्यादी. (२) विचित्र कारणांनी झालेले जव इ० **पुन्हा ३ प्रकार**–१ सैंधव तुरटी इ० २ पृथ्वीरूप जमिनीतून वर येणाऱ्या वनस्पति इ० व ३ जीव जंतु प्राणी–स्वेच्छेने चल, असे तीन प्रकार. **आणखी ३ प्रकार**–१ दोषांचे शमन करणारे २ दोषांचा प्रकोप करणारे व ३ स्वस्थ–निरोगी मनुष्याला हितकर. **पुन्हा तीन प्रकार**–१ कोठ्याच्या वरच्या भागातील दोष आमाशयांतून बाहेर काढणारे गेळफळ इ० २ खालच्या भागांतील दोष पक्वाशयातून काढणारे जयपाळ तेड इ० आणि ३ दोन्ही भागातून काढणारे कडु दोडकी शिकेकाई सांखवेल इ० **आणखी ६ प्रकार**– गोड आंबट खारट तिखट कडु तुरट असे सहा प्रकारचे. **द्रव्याचे गुण**–जड मंद थंड स्निग्ध गुळगुळीत सरबरीत मऊ स्थिर सूक्ष्म स्वच्छ हे दहा व यांच्या उलट क्रमाने हलके तीक्ष्ण उष्ण रूक्ष खरखरीत पातळ कठिण चल सूक्ष्म बुळबुळीत हे दहा असे एकंदर वीस गुण. **द्रव्याचे वीर्य प्रकार ८** –जड स्निग्ध थंड मऊ हलके रूक्ष उष्ण तीक्ष्ण. दोन प्रकार–थंड आणि उष्ण. **विपाक** ३–गोड आंबट तिखट. सुश्रुताने दोनच पाक सांगितले, गोड तिखट. यांनाच क्रमाने जड व हलका असेही म्हणतात. **द्रव्याचे कर्म**–वांती रेच बस्ति नाकात औषध घालणे शमनाकरिता व शुद्धिकरितां ( च. ) बस्ति रेचक वांती डोक्याची शुद्धि व रक्तस्राव ही पांच कर्मे होत ( अहृ.) प्रभाव–दोन द्रव्यांचा रस विपाक वीर्य ही सारखी आहेत पण एका द्रव्याचे जर एकादे विशिष्ट कार्य दिसत असले तर ते प्रभावाने होते.

**–प्रभाव**–पु., **द्रव्यस्य विशेषकर्मकर्तृत्वम्, अत्र द्रव्यप्रभावेन रसक्रमोक्तवीर्यविपाकविपरीतौ वीर्यविपाकौ अपि बोद्धव्यौ इति चक्रपाणिः** ( च. वि. १.१२ )

द्रव्याचा प्रभाव. द्रव्याचे विशेष कर्मकर्तृत्व, येथे द्रव्यप्रभाव या शब्दानें रस क्रमाने असणाऱ्या वीर्य विपाकांच्या विपरीत असणारे वीर्यविपाक सुद्धा समजावे.

**–रसगुणवीर्यविपाकविज्ञानीय**–वि., **अध्यायसंज्ञा०** ( सुसू. ४० )
अध्यायाचे नाव. यात द्रव्य, रस, गुण, वीर्य व विपाक यांचे ज्ञान आहे.

**–विकारप्रभावतत्त्व**–न., **द्रव्यविकारयोः प्रभावनिर्णयः** ( चवि.१. ११ )
द्रव्यांच्या निरनिराळ्या विकारांच्या प्रभावाचे तत्त्व.

**–विशेषविज्ञानीय**–वि., **अध्यायसंज्ञा०** ( सुसू. ४१ )
अध्यायाचे नांव. द्रव्याच्या विशेषांबद्दलचे ज्ञान यात आहे.

**–संग्रहणीय**–वि., **अध्याय०** ( सुसू. ३८ )
अध्यायाचे नाव. द्रव्यांचा संग्रह यात आहे.

**–संभार**–पु., **द्रव्याणामेकत्र आहरणं समूहो वा** ( असंसू. २५.३ )
द्रव्यांचा समूह, संभार, संचय.

**द्रव्यापहृत्**–पु., **वनस्पति० चोरकः** ( र. २२.१६७ )
चोरओवा.

**द्रव्याभिनिर्वृत्ति**–स्त्री., **द्रव्यस्योत्पत्तिः** ( सुसू. ४१.३ )
द्रव्याची उत्पत्ति.

**द्रष्टृ**–वि., **दर्शनकर्ता आत्मा** (चशा. ४.८ ) **रूपज्ञापकः** ( सुशा. ३.४ )
पहाणारा, आत्मा, रूप व्यक्त करणारा.

**द्राक्षा**–स्त्री., **फल० महाकषायवर्गे कण्ठ्यगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१० ) **कासहरगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१६; असंसू. १५.३६ ) **विरेचनोपगगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१३; असंसू. १४.४ ) **ज्वरहरगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१६; असंसू. १५.३८ ) **श्रमहरगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१६; असंसू. १५.३९ ) **स्नेहोपगगणोक्तमेकं द्रव्यम्** ( असंसू. १५.२६ ) **मधुरफलवर्गे श्रेष्ठा** ( सुसू. ४६.३३४ ) **आसवोपयोगिनी** ( असंसू. ६.१३३ ) **रसवीर्यवृद्धिकरी** ( र. ११.३७ ) **आर्द्रा द्राक्षाऽम्ला गुरुरुष्णवीर्या सरा पित्तकफप्रदा वातघ्नी च** ( असंसू. ७०.३०३ ) **द्राक्षागुणाः–मधुराऽम्ला कषाया स्वादुपाका शीता गुरुः स्निग्धा रुच्या वृष्या सन्तर्पणी पित्तघ्नी रक्तपित्तज्वरश्वासतृष्णादाहक्षयमूत्रदोषहरा च** ( ध. ५.५६ ) **सृष्टमूत्रविट् चक्षुष्याऽनिलतिक्तास्रतमदात्ययकासस्वरभेदनुच्च** ( सुसू. ४६.१८३-१८४; अहृसू. ६.११५-११७ )

हिं.–अंगूर, मुनक्का.
**म.–द्राक्ष.**
गु.–द्राक्ष, धराख.
बं.–मनेक्का, आंगूर. किसमिस.
त.–तिराक्षै.
फ.–किशमिश, आंगूर.
द्राक्ष– घशाला हितकर, खोकला नाशक, रेचक, तापनाशक, श्रमहारक, स्निग्ध, औषधाला मदत करणारे अशा गणांपैकी एक. आसवाला उपयुक्त. पाऱ्याचे वीर्य वाढवणारे, सर्व गोड फळात श्रेष्ठ. ओली द्राक्षे–आंबट, जड उष्ण सारक पित्त व वातनाशक, कफ व पित्तकारक. गुण–गोड आंबट, तुरट, पचल्यावर गोड, जड, थंड, स्निग्ध, रुचकर. शुक्र धातूला व डोळ्यांना हितकर, पौष्टिक मळमूत्र साफ करणारे. रक्तस्राव, ताप, खोकला, श्वास, दाह, क्षय, तोंडाचा कडवटपणा, फुटलेला आवाज चांगला करते.

**–रस**–पु., **द्राक्षाया रसः, मृदुकोष्ठस्य विरेचनकरः** ( चसू. १३.६७ )
द्राक्षाचा रस. हलक्या कोठ्याला रेचक होते.

**–लेह**–पु., **योग० द्राक्षापिप्पलीतवक्षीरीनागरमधुकादिसाधितोऽयं पाण्ड्वाऽऽमयहृद्रोगकामलाहलीमकज्वरगुल्मोदरशोफोदावर्तहरस्तथा विरेकसाध्यव्याधिहरश्च** ( असंचि. १८ )
द्राक्षावलेह–द्राक्ष, पिंपळी, वंशलोचन, सुंठ, ज्येष्टमध इ० नी तयार केलेला. रेचकाने बरे होणारे रोग बरे करतो. ताप, गुल्म, उदर, सूज, पोटफुगीहारक.

**–सर्पिस्**–न., **सिद्धघृत० द्राक्षालशुनादिसिद्धं घृतम्, राजयक्ष्महरमेतत्** ( का. राजयक्ष्मचि. )
द्राक्ष, लसूण इ० नी तयार केलेले तूप. क्षयनाशक.

**द्राक्षासव**–पु., **आसुत० अयं मध्वासवसमः–छेदी तीक्ष्णो मेहपीनसकासजिद्दीपनश्च** (असंसू. ६.१३२)
द्राक्षासव–हे मधाच्या आसवासारखे. हे तीक्ष्ण अग्निदीपक; प्रमेह, पडसे, खोकला जिंकते.

**द्राक्षोत्तमा**–स्त्री., **फल० गोस्तनी द्राक्षा** ( चक. चचि. २०.३३ )
गाईच्या स्तनासारख्या आकाराचे द्राक्ष. सर्व द्राक्षात उत्तम.

**द्राघिष्ठ**–न., **वनस्पति०कतृणम्** ( रा.८.१०८ )
रोहिस गवत.

**द्रामिली**–स्त्री., **वनस्पति०एला** ( र. २९.१३० )
वेलदोडा.

**द्राव**–पु., **द्रावणम्, स्त्रीणां कामपूर्तिजन्यं सुरतक्रीडाकालिकं मानभङ्गपुरस्सरवश्यतापादनं शैथिल्यं वा** ( र. ११.६५ )
स्त्रीला संभोगकाली कामपूर्ति झाल्यावर जे शैथिल्य येते व जो स्राव होतो.

**द्रावक**–न., **भैषज्य०सिक्थम्** (रा.१३.१७४; ध.३.११९)
मेण.
**खनिज० टङ्कणभेदः, श्वेतटङ्कणम्** ( ध. २.२२; रा. ६.३१ ) **द्र० 'टङ्कण'** टाकणखार.
**एतल्लोहधातुद्रावकम्**
**कान्तलोहप्रकारेष्वेकम्** ( र. ५.८९ )
कांत जातीच्या लोखंडातील एक प्रकार.
हा धातु पातळ करणारा आहे.

**–कन्द्**–पु., **वनस्पति० तैलकन्दः** ( रापरि. ७.५० )
तेल्या कंद.

**द्रावण**–न., **संस्कार० कठिनानां धातूनां द्रुतिकरणम्** ( र. १०.८२ )
कठिण धातूंना पातळ करणे.
**लवणबिडम्** ( ध. २.२८ ) बिडलोण.

**–गण**–पु., **लोहादिद्रुतिकरो गणः, गुडगुग्गुलुगुञ्जाघृतमधुटङ्कणानि** ( र. १०.९८ )
धातूंना पातळ करणारा गट. गूळ, गुग्गुळ तूप, मध, टाकणखार.

**–वर्ग**–पु., **गुडगुग्गुल्वादिद्रावणगणः** ( र. ३.९१ )
धातु पातळ करणारा गट. गूळ गुग्गुळ, तूप, मध, टाकणखार.

**द्रावणक**–पु., **खनिज० टङ्कणक्षारः** ( ध. २.२२ )
टाकणखार.

**द्राविक**–न., **लवण० सौवर्चलम्** ( रा. ६.३८ )
पादेलोण.

**द्राविड**–पु., **वनस्पति० कर्चूरम्** ( ध. ३.९४ ) कचोरा.

**(द्राविडी)**–स्त्री., **वनस्पति० एलाभेदः, सूक्ष्मैला** ( सुसू. ३८.५४; ध. २.४४ ) **द्र० 'एला'**
वेलदोडा. लहान वेलची.

**द्राविडक**–न., **लवण० बिडम्** ( रा. ६.३६ )
बिडलोण.

**द्रावित**–वि., द्रुतभावमापादितम् ( र. २.३८ )
पातळ केलेले.

**द्राविन्**–पु., खनिज० टङ्कणक्षारः ( ध. २.२२ )
टाकणखार

**द्रावी**–स्त्री., पारदससकञ्चुकेष्वेकः, लोहादिद्रावको दोषः ( र. ११.२२ )
पाऱ्याच्या दोषांपैकी सात कंचुका आहेत त्यांतली एक, धातूंचा दूषित अंश.

**द्रुत**–वि., द्रुतभूतम् ( र. २.३८ )
पातळ झालेले.

**–गति**–वि., शीघ्रविसरणशीलम् (सुनि. १०.५)
लवकर वितळणारे.

**–द्राव**–वि., शीघ्रद्रवणशीलम् ( र. २.९३ )
लवकर वितळणारे.

**–मति**–वि., लक्षण० उद्भ्रान्तमनाः ( ड. सुउ. ६०.११ ) भ्रमिष्ट.

**द्रुति**–स्त्री., स्वरसः ( र. १७.३५ ) अंगरस.
रसादेः स्थिररूपा द्रवस्थितिः ( र. १.१० )
औषधाध्मानयोगेन धात्वादिकस्य लोहस्य या द्रवाकारस्थितिः सा द्रुतिः ( र. ८.८३ )
तल्लक्षणम्– निर्लेपत्वं द्रुतत्वं तेजस्त्वं लघुता सूतेनाऽसंयोगश्चेति पञ्चधा श्रेष्ठद्रुतिलक्षणम् ( र. ८.८२ )
धातूंना काही औषधांच्या सहाय्याने अग्नीवर पातळ केले तर ते द्रवस्वरूपातच रहातात ती द्रुति. तिचे लक्षण– कशालाही न चिकटणे, पातळपणा, तेजस्विता, हलकेपणा, पाऱ्याशी न मिसळणे ही पाच लक्षणे.

**–बन्ध**– पु.,. पारदबन्ध० रसोपरसधातूनां या बहिर्द्रुतयस्ताभिः पारदस्य जारणं मारणं च। ईदृग्बद्धः पारदो दुःसाध्यरोगहरः ( र. ११.८१ )
पारा बांधला जाणे. गोळी होणे, रस उपरस धातु यांच्या द्रुतींच्या सहाय्याने पाऱ्याचे जारण मारण करणे, थोडा बद्ध पारा हा दुःसाध्य रोगनाशक आहे.

**द्रुपदी**–स्त्री., वनस्पति० वृक्षादनी ( रा. ५.१४२ )
बांडगुळ.

**द्रुम**–पु., वृक्षः ( चसि. ३.७ ) झाड.

**–व्याधी**–पु., भैषज्य० लाक्षा ( ध. ३.८२ ) लाख.

**द्रुमारुहा**–स्त्री., वनस्पति० कैवर्तिका ( रापरि. ३.३५ )
एक वेल.

**द्रुमेश्वर**–पु., वनस्पति० ताल. ( ध. ५.६८ ) ताड.

**द्रोण**–पु., मान० चतुर्गुणः कंसः ( चक. १२.९५ ) षोडशप्रस्थाः ( चचि. २९.१०५ ) आढकचतुष्टयम् (सुचि. ३१.७; असंक. ८) द्वादशाधिकपञ्चशतपलानि ( सुउ. ५२.४३ ) चतुर्विंशत्यधिकसहस्रतोलकानि ( र. ११.७-८ ) एक हजार चोवीस तोळे. चार कंस, चार आढक, सोळा प्रस्थ, ६२ पले.
न., रत्न० वैकुण्ठम् ( इन्दु. असंउ. ४२ )
एक रत्न.

**द्रोणि**–स्त्री., भाण्ड० द्रोणी, इयं द्रवस्वेदाद्यर्थमुपयुक्ता (सुचि. ३२. १३)
डोणी. पातळ द्रव्याचा शेक घेण्याला उपयुक्त.

**–चुल्ली**–स्त्री., द्रोण्याकाराऽङ्गारकोष्ठी ( र १६. ६२ ) डोणीच्या आकाराची भट्टी.

**–ज**–न., लवण० द्रोणीलवणम् (रा. ६. ४९) एक मीठ.

**–लवण**–न., लवण० तद्गुणाः–लवणमल्पोष्णमीषत्स्निग्धमविदाहि भेदनमल्पपित्तलं शूलघ्नं च ( रा. ६.४९ )
एक मीठ. अति उष्ण, थोडे स्निग्ध, जळजळ न करणारे, मळ फोडणारे, थोडे पित्तवर्धक.

**द्रोणी**–स्त्री., वनस्पति० इन्दीवरी ( रापरि. ३.२७ )
मंजरी असलेली लंबगोल जोडफळाची वनस्पती.
दारुकृतं नौसदृशं भाण्डम् ( ड. सुचि. २.७८; चचि. १(२).१०; असंसू. २६.६) जलक्षेपणी ( सुचि. १०.१३ ) लाकडाचे नावेसारखे भांडे.

**–पुष्पी**–स्त्री., वनस्पति० तद्गुणाः– कटुरुष्णा रुच्या पथ्या वातकफाऽपहाऽग्निमान्द्यहरा वातरोगाऽपहारिणी ( रापरि.५. ४८ )
हिं.–गोमा, मधुपाटी.
म.–बहुफूल.
गु.–कुलन्नुफूल.
बं.–दारुणफूला.
ता.–तुंबेकीरी
द्रोणपुष्पी. लांब पानाची वनस्पती. गुण–तिखट, उष्ण, रुचि उत्पन्न करणारी, पथ्यकर, वातकफदोष, वातरोग, अग्निमांद्य नाशक.

**द्रौण**–न., लवण० द्रोणीलवणम् ( रा. ६.४९ )
एक मीठ.

**द्रौणेय**–न., लवण० द्रोणीलवणम् ( रा. ६.४९ )
एक मीठ.

**द्वन्द्व**–न., द्विकरूपं मिथुनं द्वयम् ( चशा.१.६९ ) जोडी.

**–ज**–वि., दोषद्वयाज्जातः (चचि. ३.८९; सुउ. ३९.४६) दोन दोषांमुळे झालेला.

**द्वन्द्वन**–न., द्वन्द्वानम् (र. ८.४८) पहा 'द्वंद्वान'

**द्वन्द्वान**–न., द्रव्यद्वयस्यैकत्रमर्दनेन ध्मानेन चैकत्री-करणम् (र. ८.४८)
दोन द्रव्ये खल करून किंवा अग्नीवर तापवून एकत्र करणे.

**द्वान्द्विक**–वि., द्विदोषजम् (चनि. १.२९) दोन दोषांपासून झालेला.

**द्वारदा**– स्त्री; वनस्पतिं॰ शाकतरुः (चवि. ८.१३९) एक वनस्पती.

**द्वारपक्ष**–पु., द्वारस्य पक्षः, द्वारपार्श्वः (चशा. ८.४७; असंउ. १) दाराचे पाखे.

**द्वाःस्थ**–पु., द्वारपाल (असंसू. ८.६१) द्वारपाल. रखवालदार.

**द्वि**–वि., संख्या॰ (सुनि.१.८) दोन, संख्या.

**–ककुद्**– पु., पशु॰ उष्ट्रः (असंचि. १०) उंट. दोन वशिंडे असलेला.

**–करञ्ज**–न., पूतिकरञ्जो नक्तमालश्चेति करञ्जद्वयम् (असंसू. १६.१५)
दोन करंज. करंज व घाणेरा करंज असे दोन.

**–कर्ण**–वि., द्विकर्णिकम् (असंसू. ३४.१८) दोन कान असलेले.

**–क्षार**–न., यवक्षारः स्वर्जिकाक्षारश्चेति क्षारद्वयम्, (र. ११.५०)
जवखार, सज्जीखार. क्षारजोडी.

**–गुण**–वि., गुणद्वययुक्तम्, यथा शब्दस्पर्शगुणो वायुः (सुनि. १.८)
दोन गुणांचा, जसे शब्द स्पर्श या दोन गुणांचा वायु होय.

**–जीरक**–न., श्वेतकृष्णजीरकद्वयम् (र. १६.३६) पांढरे व काळे जिरे. जिऱ्यांची जोडी.

**–तालक**–न., तालयन्त्र॰ द्वे ताले नाम प्रदेशौ यस्य तत्, मत्स्यशकलवत् प्रतनुमुखद्विप्रदेशं द्वितालम्, इदं कर्णनासानाडीशल्यानामाहरणार्थमुपयुज्यते (सुसू. ७.१२)
सळई यंत्र. ज्या सळईला दोन्ही टोकाला माशाच्या खवल्यासारखा पसरट भाग असतो ते. हे कान नाक यांच्या नळयातील अडकलेले शल्य खेचून काढण्याकरिता उपयुक्त.

**–तिक्ता**–स्त्री., कटुका काकतिक्ता च, (अरु.) कटुका करञ्जिका च (असंसू. १६.३४; हे. अहसू. १५.४०) किराततिक्तककटुरोहिणीति, स्तन्यशोधनगणे (चक्र. चसू. ४.१२)
कडु जोडी. कुटकी, काडेचिराईत. अंगावरचे दूध शुद्ध करणाऱ्या वनस्पतींपैकी.

**–दल**–न.,मुद्गाढकीमसूरादिदलद्वययुक्तं शिम्बीधान्यम् (र. ३.३५) रसलोहानां मारकमिदम् (र. ३०.६३)
डाळ, दलांची जोडी. मूग, तूर, मसूर, इत्यादी दल जोडीयुक्त शेंगांचे धान्य.

**–निशा**–स्त्री., हरिद्रा दारुहरिद्रा च (असंसू. १६.३४; अहसू. १५.४०; र. २४.८३)
हळद जोडी. हळद व दारुहळद.

**–पञ्चमूल**–न., दशमूलम्–ह्रस्वपञ्चमूलं बृहत्पञ्चमूलं च (चसि. ३.५९; सुशा. १०.४५)
पंचमुळांची जोडी. दशमुळे. लहान पंचमुळे व मोठी पंचमुळे.

**–पञ्चमूलरस**–पु., लघुबृहत्पञ्चमूलयोः क्वाथः, निरूहेण सर्वोऽनिलव्याधिहरोऽयम् (चसि. ३.३५)
दोन्ही पंचमुळांचा काढा. याचा निरूहबस्ति सर्ववातव्याधिहर होतो.

**–पाद्**–वि., मनुष्यमयूरकुक्कुटादिः (इन्दु.) वन-मानुषमर्कटादिः (चक्र.) एतेषां नखदन्तक्षतानि सविषाणि, रागज्वरस्रावरुजान्वितानि शूनानि च भवन्ति (चचि. २३.२१९; असंउ.४६)
दोन पायांचा प्राणी. मनुष्य, मोर, कोंबडा इत्यादी. जंगली मनुष्य वानर इत्यादी. यांच्या नख व दात यांनी झालेल्या जखमा सविष असतात. लाली, सूज, ताप, स्राव, वेदनायुक्त.

**–प्रभव**–वि., द्वे प्रभवस्थाने यस्य तत् (रक्तपित्तम्) (सुउ. २२.९)
दोन उगमस्थाने ज्याची तो रोग (रक्तपित्त).

**–विन्दुक**–वि., बिन्दुद्वयमात्रम्, अत्र शेषाद्विभाषेति कप्प्रत्ययो विहितोऽस्ति (अहसू. २०.२९)
दोन थेंबाइतके.

**–बृहती**–स्त्री., कण्टकारिका महोटिका च (अरु. असंसू. १६.१५; अहसू. १५.२१) कण्टकारीद्वयम् (र. २९.६५)
दोन बृहती. रिंगणी, डोरली.

**–मार्ग**–वि., अधरोत्तरमार्गद्वयं यस्य तद् (रक्तपित्तम्) (सुउ. २२.९; चचि. ४.२४)

दोन मार्ग ( शरिरातील ) खालचा गुद, मूत्रमार्ग हे अधोमार्ग व नाक तोंड हे ऊर्ध्वमार्ग ( गट ). वरचा व खालचा अशा दोन मार्गांने स्रवणारे रक्तपित्त.

**–मुख**–वि., कृमि० **मुखद्वययुक्तः, सप्तविधेषु पुरीषजकृमिष्वेकः** ( सुउ. ५४.८ )
दुतोंड्या–सात प्रकारच्या मळातील कृमीमधील एक. दोन तोंडे असणारा कृमि.

**–योनि**–वि., **द्विप्रभवम् स्थावरजङ्गमात्मकम्** ( चसू. २५.३६ )
ज्याला उत्पत्तिकारणे दोन प्रकारची आहेत असा. स्थावर ( पार्थिव जलीय वनस्पतिज ) व जंगम ( प्राणिज ).

**–रद्**–पु., **पशु० गजः** ( सुउ. ५७.१० )
दोन दातांचा, द्विदंत, हत्ती.

**–रदकिञ्जल्क**–पु., **वनस्पति० नागकेसरम्** ( र. १२.१२१ ) नागकेशर.

**–रदरदन**–पु., **गजदन्तः, अञ्जनस्थापनार्थमस्य पेटिका विधीयते** ( असंसू. ८.९६ )
द्विदंताचे दांत, हत्तीचे दांत.

**–रदाह्वया**–स्त्री., **वनस्पति० गजपिप्पली** ( र. १२.१२१ ) गजपिंपळी.

**–रेतस्** - वि., **षण्ढ० द्विधा स्त्रीत्वपुरुषत्वोपजनकत्वेन स्थितं रेतो बीजं यस्य स द्विरेताः किंवा स्त्रीपुरुषलिङ्गी ।**
नपुंसक. स्त्री व पुरुष दोहोंची चिन्हे असणारा. स्त्रीत्व व पुरुषत्व जनक बीज ज्यात आहे असा.
**उपतप्तबीजाच्छुक्रशोणितादेतादृशी संभूतिः** ( चशा. २.१८ )
शुक्र व आर्तव हे दोष दुष्ट झाल्यामुळे असा नपुंसक निर्माण होतो.

**–रेफगणसंमता**– स्त्री., **वनस्पति० तरणी** ( ध. ५.१४५ )
भुंग्यांच्या समुदायांना पसंत अशी. काटेशेवती.

**–वार्ताकी**– स्त्री., **कण्टकारीद्वयम्** ( असंउ. २ )
रानवांगे जोडी. रिंगणी, डोरली.

**–विधोपक्रमणीय**– वि., **अध्यायसंज्ञा०** ( अहसू. १४.१ )
अध्यायाचे नाव. यात नाना प्रकारचे उपचार सांगितले आहेत.

**–व्रणीय**–वि., अध्यायसंज्ञा० ( कासंचि. द्विव्रणीयचि. १ )
अध्यायाचे नाव. यात बाहेरच्या आघाताने व शरिरातून झालेला अशा दोन व्रणांची माहिती आहे.

**–व्रणीयचिकित्सित**– न., **अध्याय०** ( चचि. २५; सुचि. १ )
अध्यायाचे नाव. यात आघातजन्य व शारीरिक अशा दोन्ही व्रणांचे उपचार आहेत.

**–शफ**–वि., **पशु० द्वौ शफौ यस्य सः, यथा हरिणगोमहिषादिः** ( चचि. १७.११८ )
दोन खूर असलेले. दोखूर. जसे हरिण, गाय, म्हैस इत्यादी.

**–हृदया**–वि., **द्वितीयं हृदयं यस्याः सा–गर्भिणी** ( ड. सुशा. ३.१८; असंशा. २.१७ )
दुसरे हृदय जिला ती–गर्भिणी.

**द्विज**–पु., **विद्यासमाप्त्या द्वितीयं जन्म यस्य भवति सः** ( चचि. १ ( ४ ) .५३ )
विद्यार्थ्याची विद्या समाप्त झाल्यानंतर त्याचा दुसरा जन्म होतो. तो द्विज.
**द्विर्जन्म यस्य स दन्तः** ( चसू. १७.६७; अहसू. ६.४० )
दोनदा जन्म होतो तो दात.
**वनस्पति० तुम्बरुः** ( ध. २.४२ )
रानकोथिंबीर. तेंदु.

**(द्विजा)** – स्त्री., **वनस्पति० रेणुका** ( ध. ३.५१ )
एक सुगंधी द्रव्य.

**–कुत्सित**–पु., **वनस्पति० श्लेष्मातकः** ( ध. ५.९४ ) भोकर

**–प्रिया**–स्त्री., **वनस्पति० सोमवल्ली** ( धपरि. ४.४ )
सोमवल्ली.

**–सौम्या** ( रापरि. ३.२९ ) सोमवल्ली.

**द्विजामय**–पु., **दन्तव्याधिः** ( असंसू. ३.२९ )
दांताचे रोग.

**द्विधालेख्य**–पु., **वनस्पति० हिन्तालः** ( रा. ९.९८ )
शिंदी.

**द्विपपिप्पली**–स्त्री., **वनस्पति० गजपिप्पली** ( ध. २.७८; र. २९.८७ )
गजपिंपळी.

**द्विरन्न**–न., **द्वितीयं भोजनम्, अत्र द्विः अन्नमिति पदच्छेदः, तेन क्रियाविशेषणपूर्वपदः कर्मधारयोऽयं बोध्यः, अन्यथा क्रियाविशेषणत्वेन**

समासाभावात् (सुसू. ४६.४९२) दुसरे जेवण.

**द्विरुत्तर**–वि., पूर्वपूर्वद्रव्याद् उत्तरोत्तरं द्रव्यं द्विगुणम्, द्विरुत्तरं द्विगुणम् (सुउ. ५५.४४) दुप्पट.

**द्विष्ट**–त्रि., प्रतिपुरुषाप्रीतिजनकम् (चचि. २०.१८) मनःप्रति घातकम् अरुचिकरत्वात् (सुसू. ४६.४७७)

द्वेष असलेले, अप्रीतिजनक. रुचीला वाईट. मनाला वीटआणणारे.

**द्वीप**–न., वनस्पति० कङ्कोलम् (ध. ३.३७) कंकोळ.

**–कर्पूरज**–पु., निर्यास० चीनकर्पूरः (रा. १२.६३) चिनी कापूर.

**–खर्जूरी**–स्त्री., वनस्पति० पारेवतभेदः, महापारेवतम् (रा. ११.९०; ध. ५.६६) द्र० 'पारेवत' खजूर.

**–ज**–न., वनस्पति० पारेवतभेदः, महापारेवतम् (रा. ११.९०) द्र० 'पारेवत' खजूर.

**द्वीपिका**–स्त्री., वनस्पति० हिंस्रा, कण्टकारी (चक. चक. १.२२) रिंगणी.

**शतावरी** (ध. १.२९१) शतावरी.

**द्वीपिन्**–पु., हिंस्रपशु० चित्रव्याघ्रः (ड. सुसू. ४६.७२; अहसू. ६.४८; धपरि. ६.६) चित्ता.

वनस्पति० चित्रकः (ध. २.८०; असंसू. ७.१५८; र. २९.८५) चित्रक.

**(द्वीपि)–चर्मन्**–न., चित्रव्याघ्रस्य चर्म, घृतमिश्रं धूपनोपयोगि (असंउ. ४) चित्त्याचे कातडे.

**–नख**– पु., भैषज्य० व्याघ्रनखम् (रा. १२.१११) वाघाचे नख.

**–पत्र**–न., चित्रकपत्रम्, अक्षिरोगे परिषेकार्थम् (काखिल. १३.५९)

चित्रकाचे पान, डोळ्याच्या विकारावर काढा शेकण्याकरिता.

**–पित्त**–न., भैषज्य० चित्रव्याघ्रस्य पित्तम्, विषहरमिदम् (असंसू. ८.२९) चित्त्याचे पित्त. हे विषहर.

**–मद**–पु., भैषज्य० हस्तिमदः (रापरि. ६.२०) हत्तीच्या गंडस्थळातील स्राव. माज.

**–मुख**–न., स्वस्तिकयन्त्रभेदः, चित्रव्याघ्रमुखसदृशं यन्त्रम्, अस्थिनिमग्नशल्योद्धरणार्थमुपयुज्यते। (सुसू. ७.१०)

स्वस्तिकयंत्राचा प्रकार. चित्त्याच्या तोंडासारखे तोंड असलेले यंत्र, हाडामध्ये रुतलेले शल्य काढण्याकरिता योजितात.

**–विष**–न., चित्रव्याघ्रस्य विषम्, तल्लक्षणम्–कण्डूनिस्तोदवैवर्ण्यसुप्तिक्लेदज्वरभ्रमविदाहरागरुक्पाकशोफग्रन्थिविकुञ्चनानि दंशाऽवदरणं स्फोटाः कर्णिका मण्डलानि च भवन्ति (असंउ. ४६)

चित्त्याचे विष. लक्षणे – खाज, टोचणी, स्पर्श न कळणे, त्वचेचा रंग बदलणे, लाली, ज्वर, भ्रम, घशाशी दाह, वेदना, सूज, ती पिकणे, स्राव होणे, हात पाय ओढणे, दंशाची त्वचा फाटणे, व्रण चरणे, फोड, गाठी, गोल व पसरट चकंदळे.

**–शत्रु**–स्त्री., वनस्पति० शतावरी (ध. १.२९१) शतावरी.

**द्वेष**–पु., शत्रुता, (चवि. ४.८) अप्रीतिः, तिरस्कारः (सुशा. १.१७; सुसू. १.२५(३)) शत्रुत्व, तिरस्कार, तिटकारा.

**द्वेष्या**–वि., शत्रुभूता स्त्री., (सुचि. २४.११५) तिरस्कारार्ह. शत्रु झालेली

**द्वैप**–वि., द्वीपिनश्चित्रव्याघ्रस्य संबन्धि (चर्मादि) (असंचि. २२; सुचि. ९.१६) चित्त्याचे चामडे, केस, नखे इत्यादी.

**द्वैहृदय्य**– न., दौर्हृदम्, द्विहृदयस्य भाव इति द्वैहृदय्यम्, भावार्थकोऽत्र ष्यञ्प्रत्ययः (चशा.४.१५) डोहाळे.

**द्व्यङ्गुल**–न., अङ्गुलद्वयम् (असंशा. ७.३३) दोन अंगुळे.

**द्व्यन्तर**–वि., द्वाभ्यामन्तरितम् (असंसू. ९.३४) दोहोंचे अंतर मध्ये असलेला.

**द्व्यन्तरीकृत**–वि., द्वाभ्यामन्तरीकृतम् (अहसू. ७.४८) दोहोंचे अंतर मध्ये ठेवून केलेले.

**द्व्यहग्राहिन्**–वि., रोग० विषमज्वरः, मध्येऽह्नी ज्वरयति, आदावन्ते च मुञ्चति। चतुर्थकविपर्ययोऽयम् (चचि. ३.७३; चशा. १.११३)

चौथाऱ्याचा प्रकार. मध्ये एक दिवस येऊन अगोदरचा व नंतरचा एक दिवस नसतो या चतुर्थकाचा दुसरा प्रकार. जो दोन दिवस ज्वर येतो मध्ये एक दिवस नसतो. चौथ्या दिवशी येऊन दोन दिवस राहातो तो.

**द्व्याहिक**–वि., रोग० यः प्रतिदिनं द्विवारं ज्वरयति सः (र. १२.६३) जो दररोज दोनदा निघतो व भरतो तो ज्वर.

**धत्तूर**-पु., वनस्पति० उपविषमेतत्, स च सितनील-कृष्णलोहितपीतभेदात्पञ्चविधः, तत्र कृष्णः श्रेष्ठः, धत्तूरगुणाः- कटुरुष्णः कान्तिकरो भ्रमकृद्व्रण-कुष्ठज्वरत्वग्दोषकण्डूतिखर्जूघ्नश्च, ( ध. ४.७; र.१९. ४९) अस्य सेवनेन नरः सर्वं पीतकं पश्यति, अपि च तस्य कम्प--लाला--मद--च्छर्दिस्मृतिभ्रंश-भ्रमादयो भवन्ति ( असंउ. ४० )
हिं.-धतूरा.
म.- **धोत्रा, धोतरा.**
गु.-धंतुरो.
बं.-धुत्तूरा.
त.-ऊमत्तै, इलकं.
फा.-तातुलह, कौसाबमात.
धोतरा उपविष. तो पांढरा निळा काळा तांबडा पिवळा असा पाच प्रकारचा. काळा श्रेष्ठ. गुण-तिखट, उष्ण, कांति वाढवणारा, ज्वर, भ्रम, व्रण, कुष्ठ, त्वग्दोष, खाज, खरूज, नाशक. याच्या सेवनाने सर्व पिवळे दिसते, कंप, लाळ गळणे, माज, ओकारी, भ्रम,स्मरणनाश इ० होतात.

**धत्तूरक**-पु., वनस्पति० धत्तूरः, ( असंउ. ४० ) धोतरा.

**धनञ्जय**-पु., वनस्पति० अर्जुनः, ( चचि. ४.७५., ध. ५.११४ ) अर्जुनसादडा.

**धनादक्ष**-पु., वनस्पति० लताकरञ्जः( रापरि. ८.२४ ) सागरगोटा.

**धनिक**-न., वनस्पति० धान्यकम् ( रा. ६.९७) धणे, कोथिंबीर.

**( धनिका )**-स्त्री., वनस्पति० धान्यकम् ( असंचि. ११; असंशा. ३.३५ ) धणे, कोथिंबीर.

**धनु**-पु., वनस्पति० भल्लातकः ( ध. ३.१४३) बिब्बा, भिलावा.

**-वृक्ष**-पु., वनस्पति० धन्वनः ( रापरि.९.२०) लाल फुलाची वनस्पती, धामणी, वेळू.

**धनुस्**-न., चापः ( चवि. ८.४२) धनुष्य.

**-स्तम्भ**-पु., रोग० अस्मिन् शरीरं वातेन धनुरिव वक्रं भवति । स बाह्याभ्यन्तरभेदाद्द्विधा अङ्गुल्यादिसंश्रितो वेगवान्वायुः शरीरं धनुरिवाभ्यन्तरं नामयति सोऽभ्यन्तरायामः, बाह्यस्नायुप्रतानस्थो बली वायुर्देहं धनुरिव बाह्यतो नामयति स बाह्यायामः ( सुनि. १.५४-५७ )
धनुस्तंभ म्हणजे धनुर्वात. वाताने धनुष्यासारखे शरीर ताठणे वाकडे होते. प्रकार २. आतला व बाहेरचा. आतल्या बाजूला धनुष्याप्रमाणे शरीर वाकडे होते तो आतला अंतरायाम व बाहेरच्या स्नायूत वात दुष्ट होऊन बाहेरच्या बाजूला शरिरास वाकडे करितो तो बाहेरचा ( बहिरायाम ).

**( धनुः)-कम्प**-पु., वातरोग० बाह्यायामः, ( असंनि. १५.२९ ) धनुर्वात. बाहेरचा धनुर्वात.

**( धनुर् )-द्रुम**-पु., वनस्पति० वंशः, ( रा. ७.२१५ ) कळक, बांबू, टोकर.

**-लता**-स्त्री., वनस्पति० **सोमवल्ली,** ( रा. ३.३ ) सोमवल्ली.
**सौम्या,** ( रापरि. ३.२९ ) सोमवल्ली.

**-वक्र**-वि., धनुरिव वक्रम्, ( असंशा. ७ ) धनुष्याप्रमाणे वाकडे.

**(-वक्रा)**-स्त्री., सूचीभेदः, चापवत्कुटिला सूची, मानतः सार्धद्व्यङ्गुला, पक्वाशयामाशयमर्मसु सीवनोपयोगिनी ( अहृसू. २६.२९ )
धनुष्यासारखी वाकडी सुई. ही अडीच अंगुळे असते. पक्वाशय आमशय आणि मर्म शिवण्याचे उपयोगी.

**-वात**-पु., वातरोग० धनुःस्तम्भः ( र. ३.१५१ ) धनुर्वातरोग.

**( धनुश् )-चल**-पु., वातरोग० धनुःस्तम्भः ( र. २१.१४१ ) धनुर्वातरोग.

**धनुष्य**-पु., वनस्पति० वंशः ( रा. ७.२१५ ) कळक, बांबु, टोकर.

**धनेशायतन**-न., पर्वत० हिमालयः ( चसि. ३.३ ) कुबेराचे घर, हिमालय.

**धनैषणा**-स्त्री., धनेच्छा ( चसू. ११.३ ) धनाची इच्छा.

**धन्य**-पु., वनस्पति० जरणद्रुमः, ( रापरि. ९.१३ ) अश्वकर्ण. एक वनस्पती.

**धन्या**-स्त्री., वनस्पति० कोशातकीभेदः महाकोशातकी ( ध. १.१९० ) द्र० 'कोशातकी'. मोठे घोसाळे, दोडके.

**धन्व**-पु., वनस्पति० वमनोपयोगिद्रव्येष्वेकम् ( असंसू. १४.२ ) पिच्छिलगुणोऽयम् ( असंशा. ४.३८ )
धामणी, वांती करविणाऱ्या द्रव्यांपैकी एक. हे बुळबुळित असते.

**-ज**-वि., धन्वस्य काष्ठादि, दन्तधावने निषिद्धमेतत् ( असंसू. ३. )

धामणीचे लाकूड पाने फुले इत्यादी हे दंतधावनाच्या उपयोगात निषिद्ध आहे.

**–भूमि**–स्त्री., देश० **जाङ्गलो मरुदेशश्च** ( सुशा. १०.१७ )
झाडी पाणी कमी असलेला देश, निर्जल देश.

**–भूमिजाता**–वि., **धन्वभूमौ जातं जननं गर्भमोचनं यस्याः** ( सुशा. १०.१७ )
निर्जलदेशात जिचा जन्म झाला ती.

**–यवास**–पु., वनस्पति० **धन्वयासः** ( चचि. ७.१४५; असंसू. १५.२९ ) धमासा.

**–यवासक**–पु., वनस्पति० **धन्वयासः** (चसू. ४.१४; ध. १.२०) धमासा.

**–यास**–पु., वनस्पति० **अर्शोघ्नगणोक्तमेकं द्रव्यम्**, ( चसू. ४.११; ) **तृष्णानिग्रहणगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१४ )
**तद्गुणाः – स्वादुस्तिक्तः कटुर्लवणोऽम्लः** ( रा. ) **शीतः उष्णः वातपित्तघ्नो दाहविषमज्वरतृषाच्छर्दिप्रमेहमोहज्वरगुल्मघ्नश्च क्षुद्रधन्वासश्चाम्लमधुरो ज्वरकुष्ठकासश्वासभ्रमघ्नः पारदशुद्धिकरश्च** (ध. १.२०)
हिं.–धमासा.
**म.–धमासा.**
गु.–धमासो.
बं.–दुरालभा.
त.–काञ्चोरी.
फा.–वादावर्द.
धमासा. मुळव्याध व तहाननाशक गणात असणारे द्रव्य. गोड कडु तिखट खारट आंबट उष्ण वातपित्तघ्न, दाह, विषमज्वर, तहान, ओकारी, प्रमेह, मूर्च्छा, ज्वर, गुल्म नाशक. लहान जात - आंबट, गोड, ज्वर, कुष्ठ, खोकला, श्वास, व भ्रमनाशक.

**–यासक**– पु., वनस्पति० **धन्वयासः** ( अहसू. १०.२९ ) धमासा.

**–रस**– पु., **जाङ्गलमांसरसः** ( अहसू. १९.५१ )
निर्जल प्रदेशातील मांसाचा रस.

**धन्वन**–पु., वनस्पति० **धनुर्वृक्षः, बदरीसदृशपत्रः,** ( ड सुचि. १५.९ ) **अस्य फलमासवार्थमुपयुक्तम्** ( चसू. २५.४९ )
**धान्वनगुणः– कटुकः कषाय उष्णो दाहशोषकरो ग्राही कफनाशनः कण्ठामयशमनश्च** (रापरि. ९.२०)
हिं.—धामिन, धाम्नि.
**म.—धामिन, धामण.**
गु.—धामण.
बं.—धामनागाछ.
वृक्ष–याचे फळ आसवाकरिता उपयुक्त. गुण–तिखट, तुरट, उष्ण, कफनाशक, मळ घट्ट करणारा, घशाचे रोग नाशक.
धामण.–बोराच्या पानासारखी पाने असणारा.

**–मृत्स्न**–न., **धनुर्वृक्षपिच्छा** ( सुचि. १५.९ )
धामणीचा बुळबुळीत भाग.

**धन्वन्तरी**–पु., देवता० **आदिदेवः, अमराणां जरामृत्युहरः,** ( सुसू. १.२१; ) ऋषि० **धनुः शल्यशास्त्रम् तस्यान्तं पारमियर्ति गच्छतीति धन्वन्तरिः,** ( चशा. ६.२१; ) ( सुसू. १.३; ) **दिवोदासः, सुश्रुतमहर्षेराचार्यः** (सुनि. १.२-३; असंसू. ८.९४)
एक देवता. धनु म्हणजे शल्य काढावयाचे शास्त्र. त्याचे पार जाणारा ते शास्त्र संपूर्ण जाणणारा. दिवोदास, सुश्रुतांचे गुरु.
**सिद्धयोग० पारदगन्धकटङ्कणादिनिर्मितो योगः सर्वकुष्ठविनाशकोऽयम्** ( र. २०.१३७ )
औषधियोग. पारा गंधक टाणकखार इत्यादि युक्त सर्वकुष्ठनाशक.

**–भाग**–पु., **रोगिषु धन्वन्तरिभागस्य दानेनैव वैद्यस्य पाककालहिंसापापमपगतं भवति, तद्यथा– सिद्धरसस्यार्थं तैलघृतलेह्यानां चाष्टमो लोहचूर्णवटकादीनां सप्तमो भागः वैद्याय देयः** ( र. ८.२ )
रोग्याच्या बाबतीत धन्वंतरीसाठी काढून ठेवलेल्या औषधीचे दान केल्याने औषधे तयार करतांना वनस्पती व प्राणी इ. ची जी हिंसा केली जाते ते पाप नष्ट होते.

**धन्विन्**–पु., वनस्पति० **अर्जुनः** ( रा. ९.१९३ )
अर्जुनसादडा.
**बकुलः** ( रा. १०. २६३ ) बकुळ.

**धन्वोत्थरस**–पु., **जाङ्गलमांसरसः स्वेदात्पूर्वोऽयमाहार्यः** ( असंसू. २५.६३; अहसू. १६.३६ )
निर्जल प्रदेशातील मांसाचा रस शेकण्याच्या पूर्वी हा ध्यावयाचा असतो.

**धमन**–पु., वनस्पति० **नलः** ( ध. ४.१४१ )
**निम्बः** ( रा. ९.४४ )
देवनळ, कडुनिंब.

**(धमनी)**–स्त्री., नाडी० शोणितवाहिनी नाडी ( चनि. ६०.८ ) नळी, नाडी. रक्तवाहिनी

तन्निरुक्तिः – ध्मानाद्धमनी, रसवहानां स्रोतसां मूलम् ताः संख्यया दश ( चवि. ५.८ ) द्वे धमनीशते ( चशा. ७. १४ ) ( काशा. ) अन्या एव हि धमन्यः ···· शिराभ्यः नाभिप्रभवाश्चतुर्विंशतिर्धमन्यः ( असंशा. ६.२८ ) ऊर्ध्वगा दश, अधोगामिन्यो दश तिर्यग्गामिन्यश्च चतस्रः ( सुशा. ९.३.९ ) ऊर्ध्वगाः शब्दस्पर्शरूपरसगन्धप्रश्वासोच्छ्वासजृम्भितक्षुद्धसितकथितरुदितादीन्विशेषानभिवहन्त्यः शरीरं धारयन्ति । तास्तु हृदयमभिप्रपन्नास्त्रिधा जायन्ते तास्त्रिंशत्, तासां तु वातपित्तकफशोणितरसान् द्वे द्वे वहतस्ता दश, शब्दरूपरसगन्धानष्टाभिर्गृह्णीते शब्दादींश्चतुरः प्रत्येकं द्वाभ्यां द्वाभ्यामित्यष्टाभी रजःप्रवर्तितात्मप्रयत्नप्रबोधमनोऽनुगताभिर्धमनीभिर्गृह्णीते, मनसश्चाणुत्वादेकत्वाच्च तासां युगपत्प्रवृत्तिर्नास्तीति तासां या धमनी मनसाऽनुयुज्यते तयैव रूपादिष्वन्यतममात्मा गृह्णीते, न पुनर्युगपदेव रूपादिकं सर्वं सर्वाभिरिति, स्पर्शग्रहणं च तिर्यग्गाणां कर्म (ड) द्वाभ्यां भाषते, द्वाभ्यां घोषं करोति, द्वाभ्यां स्वपिति, द्वाभ्यां प्रतिबुध्यते, द्वे चाश्रुवाहिन्यौ, द्वे स्तनसंश्रिते स्त्रियाः स्तन्यं वहतः, ते एव शुक्रं नरस्य स्तनाभ्यामभिवहतः । एता ऊर्ध्वनाभेरुदरपार्श्वपृष्ठोरःस्कन्धग्रीवाबाहून्धारयन्ति यापयन्ति च । अधोगमास्तु वातमूत्रपुरीषशुक्रार्तवादीन्यधो वहन्ति तास्तु पित्ताशयमभिप्रपन्नास्तत्रस्थमेवान्नपानरसं विपक्वमौष्ण्याद्विवेचयन्त्योऽभिवहन्त्यः शरीरं तर्पयन्ति अर्पयन्ति चोर्ध्वगानां तिर्यग्गाणां च अन्नपानरसम् । रसस्थानं चाभिपूरयन्ति, मूत्रपुरीषस्वेदांश्च विवेचयन्ति । आमपक्वाशये च त्रिधा जायन्ते तास्त्रिंशत्, तासां वातपित्तकफशोणितरसान् द्वे द्वे वहतस्ता दश, द्वेऽन्नवाहिन्यावन्त्राश्रिते, तोयवहे द्वे, मूत्रवस्तिमभिप्रपन्ने मूत्रवहे द्वे, शुक्रवहे द्वे शुक्रप्रादुर्भावाय, द्वे विसर्गाय ते एव रक्तमभिवहतो विसृजतश्च नारीणामार्तवसंज्ञं द्वे वर्चोनिरसन्यै स्थूलान्त्रप्रतिबद्धे, अष्टावन्यास्तिर्यग्गामिनीनां धमनीनां स्वेदमर्पयन्ति । एताभिर्नाभेरधः पक्वाशयकटीमूत्रपुरीषगुदबस्तिमेढ्रसक्थीनि धार्यन्ते याप्यन्ते च । तिर्यग्गाणां तु धमनीनां चतसृणामेकैका शतधा सहस्रधा चोत्तरोत्तरं विभज्यन्ते तास्त्वसंख्येयाः । ताभिरिदं शरीरं गवाक्षितं विबद्धमाततं च, तासां मुखानि रोमकूपप्रतिबद्धानि, यैः स्वेदमभिवहन्ति रसं चाभितर्पयन्त्यन्तर्बहिश्च, तैरेव चाभ्यङ्गपरिषेकावगाहावलेपनवीर्याण्यन्तःशरीरमभिप्रतिपद्यन्ते त्वचि विपक्वानि, तैरेव च स्पर्शं सुखमसुखं वा गृह्णीते ( सुशा. ९.३-९; अहृशा. ३.३९-४० ) धमनीक्रिया–धमन्य आकाशादिपञ्चमहाभूतसमुदायसमुत्पन्नाः कर्मपुरुषमिन्द्रियाधिष्ठानेषु पञ्चवारान्भावयन्ति ततश्चेन्द्रियपञ्चकमाकाशादिषु भूतेषु संयोज्य विनाशकाले विनाशं यान्ति ( सुशा.९.११ ) धमनी. पोकळ वाहिनी, रक्तवाहिनी, रसवहस्रोतसांचे मूळ. त्या दहा. धमन्या दोनशे. ( च. ) घन वातवाहिनी. रक्तवाहिनी शिरांपेक्षा निराळी. अन्य धातुघटकांकरिता पोषणार्थ वहन करणारी पोकळ नाडी स्वरूपाची ही नाही. हिच्यात असलेली छिद्रे स्वशरीरपोषणार्थ रससंचयार्थ केवळ आहेत. ( सुशा. ९–१० ) धमन्या शिरस्थ नाभीपासून निघाल्या त्या चोवीस आहेत. वरच्या शरीरप्रदेशात जाणाऱ्या १०, खालच्या शरीरप्रदेशात जाणाऱ्या दहा. पाय व त्वचेकडे सर्वांगात जाणाऱ्या चार. **कार्ये– ऊर्ध्वभागातील धमन्या**–शब्द स्पर्श रूप रस वास यांचे ग्रहण करितात श्वासोच्छ्वास जांभई भूक हसणे बोलणे रडणे इत्यादि कर्मे करतात. तहान भूक निर्माण करितात व पाणी आणि अन्न यांचे ग्रहण करितात व शरीरधारणाच्या कार्यात सहभागी होतात. या सर्व बेंबीच्या वरचे पोट छाती पाठ, काख, खांदा, मान डोके व हात यांचे धारण पोषण करितात. **खालच्या धमन्या**– मळमूत्र वात शुक्र आर्तवादींना खाली वाहून नेतात. पित्ताशयात असलेल्या त्या तेथल्या अन्नपानाचा पचलेला रस व इतर सारधातु तसेच मूत्र मळ घाम इ. मळ पृथक् करून तो अन्नपानरस रसस्थानाला ( हृदयाला ) पुरवितात. ऊर्ध्वभागात जाणाऱ्या धमनीच्या व त्वचेकडे जाणाऱ्या धमनीच्या स्वाधीन तो करितात. सर्व शरीराला तृप्त करितात. त्याचे पोषण करितात. या बेंबीच्या खालचे पक्वाशय मलाशय, मळ बस्ति मूत्र गुद मांड्या धारण करितात, त्यांचे पोषण करितात. **तिरक्या धमन्या**–त्वचेकडे

जाणाऱ्या धमन्यांच्या उत्तरोत्तर क्रमाने हजारो शाखा होतात. त्या सूक्ष्म सूक्ष्मतर असंख्य धमन्या सर्व त्वचेवर पसरल्या आहेत. त्यांनी हे सच्छिद्र शरीर विणले आहे व त्या सर्वत्र पसरल्या आहेत. त्यांची तोंडे केसांच्या मुळाशी बांधली आहेत. ज्यांच्याकडून घाम वाहण्याचे काम होते. रस धातू ही ज्यांच्याने शरीर घटकांना आत व बाहेर पुरविला जातो. शरिरावरील त्वचेला अभ्यंग शेक लेप यांच्या घटकाचे त्वचेत पचन होऊन, वीर्य टिकाऊ घटक शरिरात प्राप्त होतात, नेले जातात. त्यांनीच सुखकर वा दुःखदायक स्पर्श घेतला जातो.

**उत्पत्ति, कार्य व नाश**–आकाशादि पाच महाभूतांपासून उत्पन्न झाल्या. इंद्रियांच्या अधिष्ठानांत पाच प्रकारांनी कार्य करितात तेव्हा त्या पाच इंद्रियांना पाच विषयांशी कार्याकरिता संलग्न करितात व विनाशकाली, हे कार्य करून नष्ट होतात.

**वनस्पति० पृश्निपर्णी०** ( रा. ४.११७ )

**नलिका** (ध. ३.४३) देवनळ

**धमनी**–( स्त्री., )**इयं शोणितादिवाहिनी** ( चनि. ६.८ ) रक्त इ० वहन करणारी वाहिनी शिरा.

**–जाल**–न. **धमनीनां समुदायः** ( चसू. २१.१५ ) धमनीचे जाळे.

**–तत**–वि., **सिरासन्ततः** ( सुशा. ४.६५ ) शिरा पसरलेल्या असलेला.

**लक्षण० सिराव्याप्तः** ( ड. सुउ. ६२.८) शिरानी व्यापलेला.

**–प्रतिचय**–पु., **विंशतिश्लेष्मविकारेष्वेकः, धमन्युपलेपः** ( चसू. २०.१७; असंसू. २०.१५ ) कफज वीस विकारांपैकी एक. शिरा लपेटलेल्या असणे.

**–प्रविचय**–पु., **धमनीप्रतिचयः** ( चसू. १६.८४ ) पहा 'धमनीप्रतिचय.'

**–बन्ध**–पु., उपक्रम० **विषप्रतिबन्धार्थं मन्त्रादिभिर्धमनीबन्धनम्** (चचि. २३.६१) उपचार–मंत्र म्हणून विषाला प्रतिबंध करण्याला शिरा दोरीने बांधणे.

**–मर्मन्**–न., **मर्म० कण्ठनाडीमुभयतश्चतस्रो धमन्यः, द्वे नीले द्वे च मन्ये तत्रैकस्मिन्पार्श्वे एका नीला मन्या चैका, एवमपरस्मिन्नपि, जातित एतानि सिरामर्माणि, मानमेषां चतुरङ्गुलमितम् वैकल्यकरमिदं मर्म, तत्र विद्धे मूकता स्वरवैकृत्यमरसग्राहिता च भवति** ( सुशा. ६.२७ ) धमनीमर्म. मर्मस्थान. श्वास व अ[illegible] दोन्ही बाजूला एकेका बाजूला ए[illegible] एक मन्या, एकूण दोन नीला दोन [illegible] जात शिरा मर्माची. प्रमाण चार [illegible] कापले, दुखावले गेले तर मुकेपणा स्व[illegible] रसज्ञान न होणे ही चिन्हे होतात.

**–लेपक**–पु., **रोग० विंशतिकफजरोगेष्वेक:** ( कासू. ३७.१९-४२ ) २० कफज विकारांपैकी एक. शिरा लपे[illegible] वाटणे.

**–विवृतत्व**–न., **धमनीनां विस्तृतत्वम्** [illegible] ( सुशा. १०.१४ ) सिरा विस्तृत होणे.

**–व्याकरण**–न., **अध्याय०** ( सुशा. ९. ) अध्यायाचे नाव. धमनीची माहिती यात [illegible]

**धयन्ती**–वि., **स्वयं पिबन्ती** ( सुचि. २४.९२ ) स्वतः पिणारी.

**धरण**–न., **मान० एकोनविंशतिर्मध्यमा[illegible]** ( सुचि. २२.७५ ) **पलस्य दशमो भाग[illegible]** असंचि. २३ **शाणः पादतोलकम्** ( र. १[illegible] **माषद्वयम्** (र. ११.३) एकदशांश पल. एकोणवीस मध्यम पा[illegible] चतुर्थांश तोळा. दोन मासे.

**धरणी**–स्त्री; **ग्रह० रेवती** ( का. बालग्रहचि. ) एक बालग्रह रेवतीग्रह.

**–कन्द**–पु., **वनस्पति० तद्गुणाः–मधुरः क[illegible] वक्त्रदोषकुष्ठकण्डूतिनाशनः– कफपित्त[illegible]** (रा. परि ७.४२ ) धरणीकंद, एक लांबट रानकंद. हा गोड, [illegible] नाशक, तोंडाचे विकार, कुष्ठ, खाजनाशक[illegible]

**–धरसार**–वि., **धरणीधराः पर्वतास्तेषां स्था[illegible] तद्वत्सारो बलं यस्य, 'सारो बले स्थिर[illegible] इत्यमरः** ( चचि.१.६१ ) धरणीधर म्हणजे पर्वत त्याचा सार [illegible] धातूप्रमाणे जो सारवान बलवान [illegible]

**धरा**–स्त्री., **वनस्पति० मेदा** ( ध. १.१२७ ) मेदा. जीवनदायी वनस्पती.

**धराभिध**–पु., **वनस्पति० अम्लवेतसः** ( रा. [illegible] अम्लवेतस.

**धर्म**–पु., ध्रियते लोकोऽनेनेति धर्मः, 'धारणाद्धर्ममित्याहुर्धर्मो धारयते प्रजाः' इति महाभारते, धरतेर्मनिन्प्रत्ययः, (अरु.) (अहृसू. १.२) कायवाङ्मनोभिः सुचरितम् (ड.सुउ. ६०.२०; अहृसू. २.२०) श्रुतिस्मृतिविहितं यज्ञाद्यनुष्ठानम्, (सुशा. १०.५३) पुण्यम्, (सुशा. ३.३६)
ज्याच्याने समाज धारण केला जातो तो धर्म. काया वाचा मनाने चारित्र्यवान आचरण वेद व स्मृति यांनी सांगितल्याप्रमाणे यज्ञकर्म इ. आचरण पुण्यप्रद आहे.

**–द्वार**–न., धर्मशास्त्रम् (चसू. ११.२८) धर्मशास्त्र.

**–पत्तन**–न., वनस्पति० मरिचम्, (ध. २.८८) मिरे.

**–पाद्**–पु., धर्मस्य चतुर्थांशः, (चवि. ३.२५) धर्माचा चवथा भाग.

**–प्रकाशक**–वि., यो धर्मं प्रकाशयति सः (चसू.३०.२९)
धर्माचे प्रकाशन करणारा, धर्म सांगणारा.

**–भृत्**–वि., धार्मिकः धर्मं बिभर्ति आत्मनि धारयति इति धर्मभृत् (सुनि. १.३) धार्मिक.

**–वृक्ष**–पु.,वनस्पति० पिप्पलः (रा. ११.११९) पिंपळ.

**धर्मिणी**–स्त्री., वनस्पति० रेणुका (रा. ६.१००; र. १२.१२१) रेणुकबीज.

**धर्मेतरपुरःसर**–वि., धर्मेतरोऽधर्मः, स एव पुरःसरः यस्य सः अधर्मपुरस्कृतः अधर्मसहितो वा (सुशा. २.३७)
धर्मेतर म्हणजे अधर्म. त्याने पुरस्कृत अधर्मयुक्त, अधार्मिक.

**धर्षण**–न., धर्षः आक्रमणम् आस्कंदनम् (सुचि. २५.६) आक्रमण.

**धव**–पु., वनस्पति० इन्द्रवृक्षः (ड. सुचि. ३४.१७) शकटवृक्षः (सुसू. ३७.२८; अहृसू. १५.१९) कुष्ठादिहरप्रदेहे उपयुक्तः (चसू. ३.३) जाङ्गलदेशोद्भवोऽयम् (चक. १.८) दृढशुष्कदारुर्मधुरत्वग्विशिष्टः पाण्डुरवृक्षभेदः (रा. ९.८) धवगुणाः– कषायः कटुः शीतः पित्तलः (रा.) रुच्यो दीपनः पित्तकफघ्नो वातकफघ्नः प्रमेहार्शःपाण्डुघ्नश्च (धपरि. ५.४) कुष्ठमेदोघ्नश्च (सुसू. ३८.८-९; असंसू. १६.१२; अहृसू. १५.१९) गुल्माश्मरीशुक्रदोषनाशनश्च (सुसू. ३८.२०-२१; असंसू. १६.२६; अहृसू. १५.३२) काष्ठमस्य दन्तधावने निषिद्धम् (असंसू. ३.२०) त्वगस्य लेपनेनोपदंशहरा (सुचि. १९.३३) व्रणरोपणी च (सुसू. ३७.२८) बीजमस्य लोहकाठिन्यनाशनवर्गोक्तम् (र. १०.९७)
हिं.–धय, धाउरा.
म.–धावडा.
गु.–धावडो.
बं.–धाऊयागाछ.
धावडा. निर्जलप्रदेशातील झाड, याचे वाळलेले लाकूड बळकट असते. साल गोड असते. पांढरट दिसणाऱ्या झाडांपैकी एक. गुण–तुरट तिखट थंड रुचकर अग्निदीपक पित्तकफनाशक वातकफनाशक प्रमेह मूळव्याध पांडु कुष्ठ गुल्म मुतखडा शुक्रदोष व मेदनाशक. याची काडी दात घासण्याला घेऊ नये. साल उगाळून कुष्ठ उपदंश व्रण यावर लेप करावा. बी–धातूंची कठिणता नाहीशी करते. त्या वर्गात आहे.

**धवल**–पु., भैषज्य० शङ्खः (ध. ३. १७९) शंख.
पक्षि० प्रतुदजातीयोऽसौ (धपरि. ६.१२) भक्ष्याला टोचून मारणारा पक्षी.
निर्यास० चीनकर्पूरः (रा. १२.६३) चिनी कापूर.
वनस्पति० धवः (रा. ९.८) धावडा.

**(धवला)**–स्त्री., वनस्पति० पाटलाभेदः, काष्ठपाटला (रा ९.१५२;) द्र० 'पाटला'
एक पाडळ. कठिण पाडळ.
सितपाटलिः, (रापरि. १०.१७) पांढरी पाडळ.
न. वनस्पति० मरिचम् (रा ६.१३८) मिरे.

**–यावनाल**–पु., (परिव०) धान्य० जूर्णाभेदः (रा. १६.१६८) एकप्रकारचा जोंधळा.

**धवलेक्षुक**–पु., वनस्पति० इक्षुभेदः, श्वेतेक्षुः (रा. १४.१८१) द्र० 'इक्षु' पांढरा ऊस.

**धवलोत्पल**–न., वनस्पति० कुमुदम् (रा. १०.२४६) पांढरे कमळ.

**धातकि**–स्त्री., वनस्पति० धातकी (असंसू. १५.३१; अहृसू. १५.३८;) धायटी.

**धातकी**–स्त्री., वनस्पति० महाकषायवर्गे सन्धानीयगणोक्तमेकं द्रव्यम् (चसू. ४.९; असंसू. १५.१०) (अहृसू. १५.३८) अस्याः पुष्पं मूत्रविरजनीयगणोक्तम् (चसू. ४.१५; असंसू. १५.३४

पुरीषसंग्रहणीयगणोक्तम् ( चसू. ४.१५; असंसू. १५.३१ ) विषजशोफे प्रच्छिते प्रतिसारणोपयोगि ( सुक. १.४९ ) रक्ताभिष्यन्देऽञ्जनोपयोगि ( सुउ. १२.११–१२ ) आसवकारणम् ( चसू. २५.४९ ) ( असंसू. ७.२४३ ) धातकीगुणाः–कटुरुष्णा मदकृत् गर्भस्थापनी प्रवाहिकातीसारकृमिरक्तविकार-विसर्पव्रणविषघ्नी च ( ध. ३.९० ) पित्ते हिता व्रणरोपणी च ( सुसू. ३८.४७; अहसू. १५.३८; )

हिं.–धायके फूल, धावइ.

म.–धायटीफूल, पुलशायि.

गु.–धावडीना फूल.

बं.–धाइफूल.

त.–तातरिप्पूवु., काट्टात्तिप्पू.

धायटी. गुण–कडु उष्ण माज उत्पन्न करणारी गर्भ स्थापन करणारी पित्त आवरक्त हगवण कृमि रक्तविकार विसर्प व्रण विषनाशक व्रणरोपक, मूत्रदोषनाशक मळ घट्ट करणाऱ्या गणातले हे द्रव्य. विषजन्य सूज फुटल्यास वरून चोळण्यासाठी उपयोगी, रक्ताभिष्यंद नामक डोळ्याच्या विकारात अंजनासाठी उपयुक्त.

**धातक्यभिषुत**–पु., आसुत० धातकीफलासवः, अयं हृद्यो रूक्षो रोचनदीपनश्च ( चसू. २७.१८८ असंसू. ६,१२१ )

धायटीच्या फळाचे आसव. हे हृदयाला हितकर रूक्ष रोचक व अग्निदीपक.

**धातु**–पु., आश्रय आधारः (चचि. २१.१५) तन्निरुक्तिः– पुरुषधारणाद्धातुः ( चक्र. चशा. १.३ ) दधतीति धातवः, रसरक्तमांसादयः कफपित्तपुरीषाण्यपि प्राकृतानि स्वकर्मणा दधतीति धातवः; ( ड. सुशा. ४.५ ) शरीरधारणपोषणहेतुः रसरक्तादिरूपः ( सुसू. १४.२० ) वाताद्विर्दोषः (चचि. ३.७३ ) ( का. जातिसूत्रीयशा. ) वातादिः रसादिश्च ( असंसू. १०.७४ ) सत्त्वबुद्धीन्द्रियादिः, ( चक्र. चचि. २४.३६ ) धातुसंख्या नामानि च– रसादयः सप्त धातवः, ते रसरक्तमांसमेदोस्थिमज्जाशुक्राणि ( चचि. १५.१६; सुशा. ५.६ ) धातूत्पत्तिः– आहाररसाद्रसादिसप्तधातूनामुत्पत्तिः, तत्क्रमः– रसाद्रक्तं ततो मांसं मांसान्मेदो मेदसोऽस्थि ततो मज्जा ततः शुक्रं च ( चचि. १५,१६ ) एवं पूर्वधातोरुत्तरधातुः संभवति क्षीरदधिन्यायेन ( चचि. १५.२८–३४; असंसू. १.३१ ) धातुवृद्ध्यादिक्रमः– पूर्वो वृद्धो धातुः परं वर्धयति क्षीणश्च परं क्षपयति ( असंसू. १९.१६–१९) दुष्टाश्च वातादयो दोषा रसैर्धातून् दूषयन्ति ( असंसू. १९.१६–१९ ) धात्वग्नयो नाम धातूष्माणः सप्तसंख्याकाः, रसोष्म-रक्तोष्मेत्यादयः (चक्र. चचि. १५.३८) देहधातारः सप्त धातवः सप्तभिर्यथास्वमग्निभिः ते च किट्टप्रसाद-रूपं द्विविधं पाकं यान्ति। यथा रसस्य किट्टं कफः प्रसादश्च रक्तमित्यादि ( चचि. १५.१५–१८ ) परिणाममापद्यमानानामयनार्थेन देशान्तरप्रापणेन धातूनामभिवाहीनि स्रोतांसि भवन्ति ( चवि. ५.३ ) तानि च धातुवाहीनि स्रोतांसि सप्त, रसवाहिरक्तवाहीत्यादीनि ( चवि. ५.१३–१९ ) धातुसाराश्च सप्त, त्वग्रक्तमांसमेदोस्थिमज्जशुक्र-भेदेन, सत्त्वेन सत्वसारश्चेत्यष्टौ (चवि. ८.१०२) धातुकर्माणि– रसादिधातूनां क्रमशः प्रीणनं जीवनं लेपः स्नेहो धारणं पूरणं गर्भोत्पादश्चेति कर्माणि ( असंसू. १.३३; अहसू. ११.४ ) धातुमलाः– रसस्य कफः, रक्तस्य पित्तम्, मांसस्य खेषु श्रोत्रमुखादिषु स्रोतःसु जायमानो मलः मेदसः स्वेदः, अस्थ्नां नखरोमाणि, मज्ज्ञोऽ-क्षिपुरीषत्वचां स्नेहश्चेति धातूनां मलाः

धातु. धारक, आश्रय, आधार. पुरुषाचे धारण करणारा तो धातु. रसरक्तमांसादि कफपित्त मळ-मूत्र इत्यादी अविकृत असतांना स्वतःच्या कर्मांनी शरिराचे धारण करतात, म्हणून धातु. रस रक्त इत्यादि धातु शरिराचे धारण पोषण करतात. वातादि दोष शरिराच्या गरजेइतकेच असले तर ते धातु. रसरक्तादि तसेच मन बुद्धि इंद्रिये इत्यादीही धातूच होत. **संख्या व नांवे**– त्रिधातु वात पित्त कफ हे तीन धातु. –सप्त धातु–रस रक्त मांस मेद अस्थि मज्जा शुक्र हे सात धातु. **उत्पत्ति**–आहाररसापासून रसादि सात धातूंची उत्पत्ति. त्यांचा क्रम–रसापासून रक्त, रक्तापासून मांस अशा क्रमाने शुक्रापर्यंत धातु उत्पन्न होतात. अगोदरच्या धातूपासून पुढचा धातु उत्पन्न होतो. दुधापासून जसे दही होते तसे. अगोदरचा धातु पुढच्या धातूला जसा वाढवितो तसा कमीही करतो, क्षीण करतो. आहारातील

रसांनी दुष्ट झालेले दोष धातूंना दुष्ट करितात.

**धात्वग्नि**–सात धातूंचे सात अग्नि असतात. त्यांना रसोष्मा रक्तोष्मा किंवा रसाग्नि रक्ताग्नि असे म्हणतात. रसादि धातु आपापल्या अग्नीने पचत असतात. पचताना किट्ट व प्रसाद–साररूप असे दोन प्रकाराने त्यांचे दोन पदार्थ निराळे होतात. जसे रसाच्या पचनाने तयार झालेले किट्ट कफ व साररक्त होते. पचन होऊन परिणत होणारे धातु पातळ असतात; ते सारखे संचार करित असतात. त्याना वाहून नेणारी स्रोतसे असतात. त्यांना त्या त्या धातूला अनुसरुन रसवाही रक्तवाही स्रोतस इत्यादी नावे आहेत. ही स्रोतसे सात धातूंची अशी सात आहेत.

धातुसारत्व–सात धातुसार. त्वचा (रस) रक्त मांस मेद अस्थि मज्जा व शुक्र हे सार असलेले सात व आठवा सत्वसार. धातुकर्म–रसादि धातूंची तृप्ति करणे जीवन चालवणे लेप करणे स्निग्ध ठेवणे शरीर त्याच्या स्वाभाविक आकारात ठेवणे हाडे भरणे व गर्भ उत्पन्न करणे ही क्रमाने कर्मे होत.

धातुमळ–रसाचा मळ कफ, रक्ताचा पित्त, मांसाचा शरिराच्या सर्व पोकळ भागांतून बाहेर येणारा मळ ( कान नाक इ० ) मेदाचा मळ घाम, हाडांचा नख केश, मज्जेचा डोळे त्वचा मळ यांवरील स्नेह असे मळ होत.

**सुवर्णादिखनिजद्रव्यम्** (ध. ७.८७; र. १.६४–६५) **'स्वर्णं रूप्यं च ताम्रं च —' इत्यादि–सप्तधातवः तत्रापि धातुमलस्य मण्डूराभिधायकत्वं पारदसप्तकञ्चुकवाचकत्वं रसशास्त्रेऽतीवप्रसिद्धमेव ।** सोने चांदी इत्यादी सात धातु व मंडूर हा लोखंडाचा मळ, सात कंचुका इत्यादी पाऱ्याचे मळ.

**खनिज० गैरिकम्** (चशा. ५.१२; र. ५.१५; रा. १३.२३१ ) गेरू काव.

न., **खनिज० माक्षिकम्, स्वर्णमाक्षिकम्** ( ध. ३.१४८ )सुवर्णमाक्षिक, सोनामुखी.

**–कासीस**–न., **खनिज० कासीसम्** (ध. ३. १२३) हिराकस.

**–क्षय**–पु., **रोग० रसादीनां नाशः** (अहसू. १०. १६) रसादि धातूंचा क्षय नाश.

**–क्षयकर**–वि., **धातुविनाशकम्** ( असंनि. १५.८ ) धातूंचा नाश करणारे.

**–ग**–वि., **धातुस्थो दोषादिः** ( अहसू. १७.२९) धातूत जाणारे, रहाणारे ( दोष इ. )

**–गति**–स्त्री., **रसादीनां पोष्यं धातुप्रति गमनम्** ( चसू. १८.४९ ) रसादि पोषक धातूचे त्याच पोषणार्ह धातूत जाणे

**–ग्रहण**–न., **धातुवहस्रोतः** (सुसू. १५.२३ ) **धातवो गृह्यन्तेऽनेन इति धातुग्रहणं नाम धातुवहस्रोतः** धातुवाही स्रोतस.

**शरीर० हृदयम्, धातुवहस्रोतसां स्थानत्वात्** ( ड. सुसू. १५.२३ ) हृदय. धातूचे ग्रहण करणे, धातूवाही स्रोतसाचे स्थान.

**–चूर्ण**–न., **कल्प० हरितालपुष्पकासीसरसाञ्जनादिचूर्णम्, इदमुत्सन्नमांसेषु व्रणेष्ववसादने प्रशस्तम्** ( सुसू.३७. ३२-३३ ) धातूचे चूर्ण हरताल हिराकस रसांजन इ. चे चूर्ण ज्या व्रणाचे मांस वर आले आहे व कडा खाली आहेत असे मांस झरावे, खाली जावे या करिता हे उपयुक्त.

**–ज**–न., **खनिज० शिलाजतु** (ध. ३.१६५) शिलाजीत.

**–पक्तृ**–वि., **धात्वग्निः** ( चचि. १५. ३८ ) धातूंचा अग्नि.

**–प्रदूषण**–वि., **वातादिदोषाणां समत्वेन शरीरधारणात्मकानां तथा रसादिधातूनां दूषकं द्रव्यम्** ( चसू. १.६७ ) सम असताना शरीर धारण करणाऱ्या दोषांची व रसादि धातूंची दुष्टि करणारे द्रव्य.

**–प्रसादसंज्ञक**–वि., **धातूनां प्रसादो धातुप्रसादः, स एव संज्ञा यस्य तत्, पञ्चेन्द्रियद्रव्यम्, अत्यर्थशुद्धेनैव धातुप्रसादेनेन्द्रियारम्भ इति** ( चक्र. चसू. २८.४ ) धातुप्रसाद म्हटला गेलेला. धातूचा प्रसादरूप अंश. पंचेंद्रियांची उत्पत्ति व पोषण करणारे द्रव्य. हे अतिशय शुद्ध म्हणूनच इंद्रियजनक व परिपोषक.

**–भेद**–पु., **मूलघटकतत्त्वानां भिन्नत्वम्** ( चशा. १.३ ) मूलघटक तत्त्वांची भिन्नता.

**–माक्षिक**–न., **खनिज० माक्षिकम्** ( ध. ३.१४८ ) सुवर्णमाक्षिक, माक्षिक.

**–राग**–पु., **गैरिकमनःशिलादिधातुभिरानीतो वर्णः** ( र १.११–१५ ) गेरू मनशीळ इत्यादी धातूंनी आणलेला उत्पन्न केलेला रंग,

**–वर्धन**–वि., **रसादिधातून् वर्धयति यत् तत्** ( अहृसू. ५.२० )
रस इत्यादी धातूंना वाढविते ते.

**–वल्लभ**–न., **खनिज० टङ्कणक्षारः** ( रा. ६.२९ )
टांकणखार.

**–वाद**–पु., **स्वर्णादिधातूनां शोधनं मारणं च, लोहादिहीनधातुभ्यो हेमाद्युत्कृष्टधातुनिर्माणम्** ( र. ७.३४ )
सोने इत्यादी धातूंची शुद्धि व भस्म करणे. लोखंड इत्यादी हीन धातूंपासून सोने इत्यादी उत्कृष्ट धातु निर्माण करणे.

**–विष**–न., **स्थावरविषभेदः, फेनाश्महरितालं च द्वे धातुविषे, अनेन हृत्पीडनं मूर्च्छा तालुदाहश्च भवति** ( सुक. २-५.१०; असंउ. ४० )
खनिज विष. सोमल हरताळ ही दोन धातुविषे, यांनी हृदयात वेदना, मूर्च्छा, टाळूची आग होते.

**–वैषम्य**–न., **वातादिधातूनां स्वमानान्न्यूनत्वमधिकत्वं वा, विकारः 'विकारो धातुवैषम्यं साम्यं प्रकृतिरुच्यते'** ( चसू. ९.४ )
वातादि धातूंचे उचित प्रमाणापेक्षा आधिक्य किंवा न्यूनत्व. विकृति. धातुवैषम्य म्हणजे विकार; धातूंचे साम्य म्हणजे प्रकृति म्हणजेच आरोग्य.

**–व्यूहन**–न., **धातुरचना धातुवहनं च** (चक्र. चशा. ४.१२) धातूंची रचना. धातूंचे वहन.

**–संनिभ**–वि., **गैरिकसमानम्** (र. २.८८) गेरूसारखे.

**–समता**–स्त्री., **धातुसाम्यम्, धातु मलोपधातूनां साम्यम्** ( सुनि. १-१० )
धातूंचे साम्य. समता. धातु मळ व उपधातु यांचे साम्य.

**–सामान्य**–न., **धातूनां समानत्वम्, एकविधत्वं च** ( अहृसू. ६.६४ )
धातूंचे समानत्व, एकप्रकारत्व. समानधर्मत्व.

**–साम्य**–न., **सर्वधातूनां समप्रमाणत्वम्, आरोग्यम् तल्लक्षणम् – रुगपगमनं स्वरवर्णयोगः शरीरोपचयो बलवृद्धिरभ्यवहार्योऽभिलाषो रुचिराहारकाले–ऽभ्यवहृतस्य चाहारस्य काले सम्यग्जरणं, यथाकालं निद्रालाभो वैकारिकाणां च स्वप्नानामदर्शनं सुखेन च प्रतिबोधनं वातमूत्रपुरीषरेतसां मुक्तिः सर्वाकारैर्मनोबुद्धीन्द्रियाणामव्यापत्तिश्चेति** (चवि. ८.८९ )
शरीरधारणाला आवश्यक इतके सर्व धातूंचे प्रमाण असणे–समप्रमाणत्व. तेच आरोग्य. त्याचे लक्षण वेदना वा रोगाचे एकूणएक चिन्ह जाणे. चांगला स्वर व नितळ वर्ण येणे. शरीर पुष्ट होणे. बळ वाढणे, अन्नाची अभिलाषा रुचि, जेवणाचे वेळी खाल्लेल्या अन्नाचे योग्य काळात चांगले पचन, योग्य वेळी झोप विकृत स्वप्ने न दिसणे, आनंदाने झोपेतून उठणे वातमूत्र मळ यांचे सुखाने विसर्जन. मन बुद्धि इंद्रिये यात कोणतेही वैगुण्य नसणे.
**दोषधातुमलानां साम्यम्** (ड. सुसू. ४६. ४६८)
दोष धातु व मळ यांचे शरीरधारणार्थ योग्य तितके प्रमाण. समप्रमाण.

**–साम्यकृत्**–वि., **धातुसाम्यकरम्** (अहृसू. ६-२७)
विषमधातूंना सम करणारे.

**–सार**–पु., न., **धातोर्बलम्, धातुसाराणि सप्त, अष्टमं च सत्त्वसारम्, विशुद्धतरो धातुः सारशब्देनोच्यते** ( चवि. ८. १०२-१०९., सुसू. ३५. १६ )
धातूचे बळ सार म्हणजे विशुद्धतर–अधिक विशुद्ध धातु. धातुसार सात. आठवे सत्त्वाचे सार.

**–स्थिरत्व**–न., **रसादिधातूनां स्थैर्योपादनम्** (सुचि. ३३.२७; अहृसू. १८.६०; असंसू. २७.६५)
रसादि धातूंची स्थिरता.

**–हन्**–पु., **खनिज० गन्धकः** ( ध. ३.१०९ )
धातुमारक, गंधक.
**रसादिधातवो नित्यं क्षीयमाणाः सन्तोऽशितादिजनितधातुमाहार्यैव स्वास्थ्यं जनयन्ति** ( चसू. २८.३; असंसू. १.३२ )
रसादि धातु नित्य क्षीण होत असताना आहारापासून बनलेल्या रसादि धातूंना खाऊनच आपले आरोग्य निर्माण करतो. क्षीण घटकांची पूर्ती करून स्वास्थ्य निर्माण करतो.

**धातुकि**–स्त्री., **वनस्पति० धातकी** ( असंसू. १६.३२ )
धायटी.

**धातुकी**–स्त्री., **वनस्पति० धातकी**, (असंसू. १७.४३)
धायटी.

**धातूष्मन्**–पु., **रसादिधातुगतमौष्ण्यम्, धात्वग्निः** ( असंनि. ५.१९ ) धात्वग्नि. रसादि धातूंतला उष्मा, अग्नि. धात्वग्नि.

**धातृ**–वि., **धारणकर्ता आत्मा जगतो धारणाद्धाता** ( चशा. ४.८ ) **पञ्चमहाभूताऽऽत्मकशरीरादिसंयोगधारणहेतुः क्षेत्रज्ञः** ( ड. सुशा. ३.४ )

धारण करणारा. जगाचे धारण करतो म्हणून धाता. पाच महाभूतात्मक शरीर इंद्रिये इत्यादींचा संयोग धारण करण्यास कारणरूप असलेला, क्षेत्रज्ञ, आत्मा.

देवता० ब्रह्मा, प्रजापतिः ( असंसू. २८.३५ )

ब्रह्मदेव प्रजापति.

**( धात्री )** स्त्री.,–**बालसङ्गोपनार्थं नियुक्ता स्त्री, उपमाता** (चचि. ३०.२२९) **स्तन्यदात्री** ( चशा. ८.५२;- कासू. १९ ) **बालकपोषयित्री** ( ड. सुउ. २७.६ ) **कुमारपरिचारिका** ( सुसू. १६.३ ) **माता, स्तनदायिनी च** ( अरु. अहउ. १.२८–२९ ) **तल्लक्षणानि–धात्री यथावर्णं नाम समानवर्णा मध्यमप्रमाणा मध्यमवयस्काऽरोगा शीलवत्यचपलाऽलोलुपाऽकृशाऽस्थूला प्रसन्नक्षीराऽलम्बौष्ठ्यलम्बोर्ध्वस्तन्यव्यङ्गाऽव्यसनिनी जीवद्वत्सा दोग्ध्री वत्सलाऽक्षुद्रकर्मिणी कुलवती श्यामा नाम तप्तकाञ्चनवर्णाभा स्त्री च ईदृशी धात्री बालस्याऽऽरोग्यबलवृद्धये भवति** ( सुशा. १०.२५; असंउ.१ )

दाई. बालकाच्या संगोपनाकरिता नियुक्त स्त्री, बालाचे पोषण करणारी उपमाता, अंगावरचे दूध पाजणारी, स्तन देणारी, माता, कुमारपरिचारिका तिची सुलक्षणे - आईच्या समान वर्णाची. आई ब्राह्मणी तर दाई ब्राह्मणी; ही क्षत्रिय तर ती क्षत्रिय अशी. मध्यम उंचीची, काळी सावळी, पण तापलेल्या सोन्याच्या रंगासारखी, मध्यम वयाची निरोगी कुलवान शीलवान, अचंचल असावी. लालची व्यसनी नसावी, कृश किंवा स्थूल नसावी, लांब ओठांची. लांब व वर झुकलेल्या स्तनांची, क्षुद्रवृत्तीची नसावी, मुलांवर प्रेम असणारी, स्वतःचे मूल जिवंत असलेली. दूध निर्दोष आणि प्रसन्न असलेली असावी, अशी दाई बालाचे आरोग्य बळवाढीला उपयुक्त होते.

**यन्त्र० घर्षणी घर्षी वा** ( र. ९.८४ )

यंत्र, बत्ता, घोट्या, वरवंटा, वाटा.

**वनस्पति० आमलकी,** ( चसू. ४.१८; सुउ. १२.११–१२ ) ( असंसू. १५.४९ ) **इयं वयःस्थापनी** ( चसू. ४.१८ ) **अस्याः पुष्पाण्यञ्जनार्थमुपयुज्यन्ते** ( सुउ. १२.११–१२ )

आवळा. तारुण्य कायम ठेवणारी.

हिची फुले डोळ्यात अंजनाकरिता उपयुक्त.

**धात्रिका**–स्त्री., **वनस्पति० आमलकम्** ( रा. ११.३२५ )

आवळा.

**धात्री**–स्त्री., ( चसू. .४.१८ ) दाई.

**–चिकित्सित**–वि., **अध्याय०** ( का. धात्रीचि. )

अध्यायाचे नाव. यात दाईचे उपचार आहेत.

**–द्वेष**–पु., **लक्षण० धात्रीविषयेऽप्रीतिः** ( कासू. २५.३६ ) दाईचा द्वेष, तिटकारा.

**–पत्र**–न., **वनस्पति० तालीसपत्रम्** ( रा. ६.८२ )

तालीसपत्र.

**–परीक्षा**–स्त्री., **स्तन्यदाय्याः परीक्षणम्** ( चशा. ८.५२ ) द्र० ' **धात्री** ' दाईची परीक्षा.

**–फल**–न., **वनस्पति० आमलकम्** ( ध, १.२१५ ) ( सुउ. ४४.२७ ) आवळा.

**–मूल**–वि., **धात्री स्तन्यदात्री मूलं कारणं यस्य तत्सुखदुःखादि** ( का. धात्रीचि. )

ज्या सुखदुःखाच्या मुळाशी दाई कारण आहे अशी सुखदुःखे.

**–यूष**–पु., **कल्प० मुद्गामलकनिर्यूहः, अयं पञ्चकर्मसूपयुक्तः** ( काखिल. ४.३७ )

मूग व आवळा यांचे कढण. पंचकर्मात अन्न म्हणून उपयुक्त.

**धात्रेयी**–स्त्री., **वनस्पति० आमलकम्** ( रा. ११.३२६ )

आवळा.

**धात्वग्नि**–पु., **धातुगतमौष्ण्यम्** ( चचि. १५.३८ )

धातूचा अग्नि.

**धात्वन्तरस्थ**–वि., **एकस्माद्धातोरन्यो धातुर्धात्वन्तरं तत्र स्थितो लीनो वा** ( सुउ. ३९.६५ )

अन्य-दुसऱ्या धातूत असलेला.

**धात्वन्तरं नाम कला, तत्र स्थितः** (सुउ. ३९.६५)

धात्वंतर म्हणजे कला. तिच्यात असलेला.

**धात्ववकाश**–पु., **धात्वन्तरम्, स्रोतःसिराधमनीरसायन्यादि** ( चवि. ५.९; असंशा. ६.५० )

धातूंचा अवकाश. स्रोतस शिरा धमनी रसायनी इत्यादी.

**धात्वाहार**–वि., **धातुराहारो यस्य सः ( धातुः )**

धातु हा आहार ज्याचा तो (धातु) धातुभक्षक (धातु)

**धानक**–पु., **मान० माषकः,** ( असंक. ८ )

वजन. एक मासा.

**( धानका )**–स्त्री., **वनस्पति० धान्यकम्,** ( असंचि. ११ ) ( अहसू. १५–१६ )

धणे, कोथिंबीर, कोथिंबिरीचे फळ,

**धाना**–स्त्री., भक्ष्य० भृष्टयवादिधान्यम्, तद्गुणाः–लेखनी तर्पणी दुर्जरा च ( चसू. २७.२६६ ) **विष्टम्भिनी रूक्षा गुरुश्च** ( अहृसू. ६.३८; चचि. १२.१०; सुचि. १०.५ )
लाही. फुटाणे, चुरमुरे. गुण–रूक्ष, दोष घासून काढणारी, तृप्त करणारी पण पचायला जड. मलावरोधक.
**भृष्टयवाः लघवः कफमेदोविशोषणाः** (सुसू. ४६.४१०) **श्वासव्याधिहराः** (सुउ. ५१.३६) भाजलेले जव. हलके कफ व मेदशोषक; श्वासनाशक.
**भृष्टं धान्यम्** ( अहृसू. ६.३८ ) भाजलेले धान्य.

**धानी**–स्त्री., वनस्पति० धान्यकम् ( ध. २.६३ ) धणे. **पीलुः** ( ध. ५.५१ ) पीलु.

**धानेय**–न., वनस्पति० धान्यकम् ( रा. ६.९७ ) धणे.

**धानेयक**–न; वनस्पति० धान्यकम् ( ध. २.६३ ) धणे.

**धान्य**–न., आहारद्रव्य० **शूकधान्यं शिम्बीधान्यं शाल्यादिसर्षपान्तम्** ( सुसू. ४६.४-५२ ) **तत्र सर्वमपि नवं धान्यमभिष्यन्दि, संवत्सरोषितं लघु विरूढं विदाहि गुरु विष्टम्भि दृष्टिदूषणं च, अनार्तवं कुङ्कुमादिव्याधिहतमपक्वमभूमिजमूषरोपलकादिसविषभूमिजं नवं च धान्यमगुणवत्, एतद्विपरीतं गुणवत्** ( सुसू. ४६.५०-५१; अहृसू. ६.२५ ) **तत्र रक्तशालिषष्टिकौ यवगोधूमौ च शूकधान्येषु वरौ तथा मुद्गाढकीमसूराश्च शिम्बीधान्येषु प्रवराः** ( चसू. २७.२१–२४; सुसू. ४६.३३२ )
आहाराचे द्रव्य. कूस तूस असलेले ( लोंब्या असलेले ) व शेंगा असलेले धान्य. साळीपासून मोहरीपर्यंत धान्य. सर्व नवे धान्य शरीरात स्राव वाढविणारे असते. एक वर्षाचे जुने हलके असते. मोड आलेले धान्य–छातीत, घशात जळजळ करणारे, जड, अवष्टंभक व दृष्टीला घातक. योग्य ऋतूत व जमिनीत न झालेले, रोग झालेले, अपक्व, विषारी किंवा बरड जमिनीत झालेले व नवे धान्य गुणकारक नाही. लाल साळ साठे तांदूळ जव गहूं लोंबीच्या धान्यात श्रेष्ठ. मूग तूर मसूर शेंगांच्या धान्यात श्रेष्ठ व गुणवान् असते.
**वनस्पति० धान्यकम्** ( चसू. ३.८; सुउ. ४७.३०; अहृसू. १४.२५; रा. ६.९७ ) धणे.
**परिपेलम्** ( अहृसू. १५.२६; रा. ८.१०५ ) नागरमोथा, दिंडा.

**(धान्या)**–स्त्री., वनस्पति० धान्यकम् ( ध. २.६३ धणे. )

**–ज**–न., वनस्पति० धान्यकम् ( रा. ६.९७ ) धणे.

**–तुम्बुरु**–न., वनस्पति० हरित० **धान्यकम्** ( चसू. २७.३०७; असंसू. ७.१५६ ) धणे.

**–तुम्बुरुयूष**–पु., **धान्यतुम्बुरुक्वाथः, सर्वविषापहोऽयम्**, ( चक. ४.१५ ) धण्यांचा काढा.

**–नागरसिद्धतोय**–न., कल्प० **धान्यकशुण्ठीभ्यां षडङ्गविधिना सिद्धं तोयम्** (चक्र.) **इदं स्नेहाजीर्णं जरयति श्लेष्माणं च भिनत्ति** ( चसि. ४.४३ )
धणे व सुंठ यांनी तयार केलेले पाणी. हे तेल तूप इ० स्नेहाचे अजीर्ण जिरविते व कफ नाश करते.

**–बीज**–पु., वनस्पति० धान्यकम्, ( रा. ६.९८ ) धणे.

**–माष**–पु., मान० **व्रीहिमाषः**, ( चशा. ८.१९ ) **तण्डुलद्वयम्**, ( चक. १२.८७–८८ ) **सुवर्णमाषकस्य द्वादशो भागः** ( सुचि. ३१.७ )
वजन. दोन तांदूळ भार. सोन्याच्या माशाचा बारावा भाग.
**वनस्पति० माषः** ( ध. ६.९९ ) मासा.

**–मृद्**–स्त्री., **धान्यमूलमृत्तिका** (इन्दु.) **इयं काण्डचित्राख्यसर्पविषे प्रलेपोपयोगिनी** ( असंउ. ४२ )
कोथिंबिरीच्या मुळाची माती. कांडचित्र नावाच्या सर्पाच्या विषावर लेपाकरिता.

**–यूष**–पु., **धान्यप्रधानो यूषः, अयं प्रवाहिकानाशनः** (चचि. १९.३५)
धणे अधिक घालून केलेले कढण. हे आव रक्ताची हगवण नाशक.
**कुलत्थादिधान्यकृतो यूषः, अयं वातविकारिणां हितः** ( सुचि. ४.१४ )
कुळीथ इत्यादि धान्याचे केलेले कढण. हे वातविकार झालेल्यांना हितकर.
**अखण्डितानां धान्यानां सर्वेषां समभागिनां माषतिलनिष्पावसर्षपादृते साधितश्चित्रकदाडिमाभ्यां संस्कृतश्च धान्ययूषो भवति । मुख्योऽयं धान्ययूषः** ( काखिल. ४.४२-४३ )
उडीद तीळ पावटे मोहरी यांखेरीज अन्य धान्ये अखंड समभाग घेऊन त्यात चित्रक डाळिंब घालून तयार केलेले कढण. हे मुख्य कढण आहे.

**–राज**–पु., वनस्पति० यवः ( रा. १६.१२४ ) जव.

**–वीर**–पु., वनस्पति० माषः ( रा. १६.१५४ ) उडीद.

**-श्रेष्ठ**-न., वनस्पति० व्रीहिः ( रा. १६.८१ ) तांदूळ.

**-स्वेद**-पु., उपक्रम० माषादिकोष्णधान्यस्वेदः, धान्याम्लम्, अयं छिन्नादिषु स्वेदोपयोगी ( सुचि. २.२५ ) माषादिशिम्बीधान्येन स्वेदनम् ( ड.) वमनादिव्यापदि वातशूले स्वेदनार्थमुपयुज्यते ( सुचि. ३४.९ ) द्र० ' स्वेद '

धान्याचा शेक. उडीद इत्यादी शिजवून त्यांनी शेकणे. अवयव कापला, पिचला इत्यादी आघातानंतर रक्तस्राव अति झाल्याने उत्पन्न झालेल्या वेदनांवर शेकण्यास उपयोगी. रेचक ओकारी इ० उपचारात वात प्रकोप होऊन शूल झाला असता हा शेक चांगला. कांजी.

**धान्यक**-पु., मान० चतस्रोऽण्डिकाः, धान्यमाषः ( चक. १२.८९ ) वजन चार अण्डिका दोन तांदूळ.
न., हरित० कुस्तुम्बरुधान्यम् (चसू. ३.८) शीतप्रशमनगणोक्तमेकं द्रव्यम् ( चसू. ४.१७; असंसू. १५) तृष्णानिग्रहणगणोक्तमेकं द्रव्यम्, (चसू. ४.१४) कण्ड्वादिहरोद्वर्तने उपयुक्तम्, ( चसू. ३.८ ) आर्द्रं धान्यकं रोचनं सुगन्धं नातिकटुकं दोषोत्क्लेशकरं च (चसू. २७.१७३) धान्यकगुणाः– स्वादु कषायं शीतं स्निग्धं मधुरविपाकि चक्षुष्यं हृद्यं पित्तकफघ्नं तृड्दाहकासच्छर्दिज्वरघ्नं च (ध. २.६३; असंसू. १६) रोचनं दीपनं वातकफघ्नं दौर्गन्ध्यनाशनम् (चसू. २७.३०७) रुच्यमन्नगन्धहरं च (असंसू. १२)
हिं–धनिया, कोथुंबुरि,
म.–धने. **कोथिंबीर.**
गु.–धाणा, कोथमीर.
बं.–धने.
ता.–कोत्तुमल्लि, उत्तपरि,
फा.–किश्निज.

हिरवे कच्चे खावयाचे द्रव्य. कोथिंबीर धणे. थंडी तहान खाज नाहीशी करणारे जे पृथक पृथक गण आहेत त्यांतले द्रव्य. खाजेकरिता उटणे लावावे गुण. ओली–किंचित् तिखट रुचकर सुगंधी दोष उचंबळून आणणारी. धणे–गोड तुरट थंड स्निग्ध पचल्यावर गोड रुचकर अग्निदीपक दुर्गंधीनाशक, हृदय व डोळे यांना हितकर कफपित्तवात नाशक. तहान, आग, ओकारी, ताप, खोकला नाशक.

**( धान्यका )**-स्त्री., वनस्पति० धान्यकम् ( ध. २.६३) धणे,

**धान्याक**-न., वनस्पति० धान्यकम् ( र. ११.१२५. ) धणे.

**धान्याभ्रक**-न., कम्बलवस्त्राऽवगुण्ठितमभ्रकचूर्णं शालियुक्तं दिनमेकं काञ्जिके क्षिप्त्वाऽपरस्मिन्दिने मर्दनेन वस्त्रादायाति तत् ( र. २.१९ )

सूक्ष्म अभ्रक. साळींच्या सहाय्याने केलेले सूक्ष्म अभ्रक. अभ्रक कांबळ्यात बांधून एक दिवस पुरचुंडी आंबट कांजीत ठेचावी. नंतर दुसऱ्या दिवशी ती परचुंडी चुरावी, चोळून चोळून परचुंडीतून जे अभ्रक बाहेर येईल ते.

**धान्याम्बु**-न., काञ्जिकम् (चसू. २५.४९) कांजी. कुस्तुम्बरीफलसिद्धं जलम्, इदं तृष्णासु शस्तम् ( चचि. २२.६१ )

धण्याने तयार केलेले पाणी. हे तहानेवर प्रशस्त.

**धान्याम्ल**-न., आसुत० काञ्जिकम् (चक. चक. १.१२) (ध. ६.२४९) शालीजूर्णाह्वकोद्रवादिकृतं मद्यम् (सुसू. ४५.२१४)
तत्कृतिः– षष्टिकधान्यस्य प्रस्थं नीरप्रस्थद्वये क्षिप्त्वाऽऽधारभाण्डं संरुध्य भूमिगर्भे संस्थाप्य पक्षाच्च समुद्धृत्य वस्त्रपूतं कारयेत्। जातरसं सत् सर्वकर्मसु योजयेत् (सुसू. ४२.११)
तद्गुणाः– स्पर्शाद्दाहनाशनं गण्डूषधारणात्कफनिर्हरणं मुखवैरस्यदौर्गन्ध्यमलशोषक्लमापहं लघु दीपनं जरणं भेदि हितमास्थापने समुद्राश्रितजनानां सात्म्यं च (सुसू. ४५.२१४-२१६) कृमिनाशनं च ( सुउ. ५४.२८ ) तीक्ष्णोष्णं पित्तकृदुच्यं बस्तिशूलनुद्वातकफापहं च (अहसू. ५.७९) तदेवालवणं शीतं मुखशोषहरं च (असंसू. ३१.८-९) धान्याम्लं माषादेर्वैदलानां तालफलादीनामनुपानम् (सुसू. ४६.४२७,४३३) शाकावरान्नेषु चाऽनुपानम् ( असंसू. १०.४६ )
वातशोफजव्रणे परिषेकार्थमिदम् ( सुचि. १.१७) दाहाभिभूते ज्वरे परिषेकोपयोगि (सुउ. ३९.२८४) कुक्षिशूले परिषेचनोपयोगि (सुउ. ४२.१३०) अर्शःप्रयुक्तक्षारस्य प्रक्षालनोपयोगि ( सुचि. ६.४) विरेचनोपयोगिद्रव्येष्वेकम् ( असंसू. १४.४ )

कांजी. भात जोंधळा हरीक इत्यादींपासून बनवलेले मद्य. कृति–साठे तांदूळ व त्याच्या दुप्पट पाणी एका मातीच्या भांड्यात घालून ते बंद करून जमिनीत पंधरा दिवस ठेवून काढावे, फडक्या-

तून गाळावे. योग्य रस व चव आल्यावर सर्व कामात ती योजावी. गुण–दाहावर अंगाला लावावी. कांजीने गुळण्या केल्याने तोंडातील कफ जाऊन बेचव दुर्गंधी, मळ, शोष, कमी होतो. थकवा जातो. हलकी, पाचकाग्नि-वर्धक, पाचक, मळ फोडणारी, समुद्राजवळ रहाणाऱ्याना आत्मसात् होणारी. बस्ती देण्यास उपयुक्त. कृमिनाशक. तीक्ष्ण, उष्ण, पित्तकर, रुचकर, वात-कफहर, बस्तिशूलनाशक. अनुपान–उडीद इत्यादी डाळी व ताड खोबरे इत्यादी फळे खाल्लयानंतर अनुपान म्हणून चांगली. वातसुजेच्या व्रणावर, दाहयुक्त तापात कुशीत शूळ असताना, मूळ-व्याधीच्या मोडावर क्षार लावल्यावर शिंपडणे धुणे यांसाठी उपयोगी. रेचक म्हणूनही उपयुक्त.

**धान्याम्लबीज**–न., **धान्याम्लतलस्थं द्रव्यम्** (हे. अहसू. ३०.३३)
कांजीतला गाळ. तळांतले द्रव्य. पुन्हा कांजी करण्याला उपयुक्त.
**किण्वम्** ( असंसू. ३९.१२ )
मद्याचा गाळ, तळांतले द्रव्य. जगल.

**धान्यासव**–पु., **आसुत० धान्यकृत आसवः, सुरासौवीरादिधान्यासवाः षट्** ( चसू. २५.४९ )
धान्याचे आसव. सुरा सौवीर इत्यादि धान्याची आसवे होत.

**धान्योत्तम**–पु., **श्रेष्ठो व्रीहिः** ( रा. १६.७८)
तांदूळ. चांगला व्रीही जातीचा तांदूळ.

**धान्व**–वि., **जाङ्गलदेशोद्भवं प्राण्यादि** ( असंचि. ४ )
निर्जल प्रदेशातील प्राणी वनस्पती इ.

**धान्वन**–वि., **धन्वनस्य संबन्धि फलादि**
(सुसू. ४६.१७०) निर्जल प्रदेशातील फळे इत्यादि.
–**यूष**–पु., **जाङ्गलमांसरसः, अयं पित्तशूले हितः** ( सुउ. ४२.१०७ )
निर्जल प्रदेशातील प्राण्यांचे मांसरस. हा पित्तज शूळावर हितकर.

**धान्वन्तरघृत**–न., **घृत० भल्लातकबिल्वपिप्पलीमूलादि-साधितं घृतम्, एतन्मेहश्वयथुकुष्ठगुल्मोदरार्शः-प्लीहविद्रधिपिडकानां नाशनम्**
( सुचि. १२.५; असंचि. १९. )
एक तूप. भिलावा बेल पिंपळमूळ इत्यादींनी तयार केलेले तूप–हे प्रमेह, मुळव्याध, गुल्म, प्लीहा, उदर, गळवे, पुळ्या, सूज, कुष्ठ नाशक,

**धान्वन्तरसर्पिस्**–न., **घृत० दशमूलहरीतकीदेवदार्वादिसिद्धं घृतम् । एतत्सर्वप्रमेहपिटिकाकुष्ठविषशोफार्शोगुल्मविद्रधिप्लीहजठरश्वासकासवर्ध्मपाण्डुरोग-वातशोणितोन्मादाऽपस्मारहरम्** ( असंचि. १४ )
एक तूप. दशमुळे हिरडा देवदार इत्यादींनी सिद्ध तूप. हे सर्व प्रमेह त्यातील पुळ्या सूज अंडवृद्धि वातरक्त कुष्ठ गुल्म गळवे प्लीहा उदर श्वास खोकला पांडुरोग विष उन्माद अपस्मारनाशक.

**धान्वन्तरीय**–वि., **धन्वन्तरितन्त्राध्यायी, शल्यविद्, धन्वन्तरिणा कृतं तंत्रं धान्वन्तरीयं, धान्वन्तरीय. तन्त्रमधीते सःधान्वन्तरीयः** ( चचि. ५.४४; असंशा. ५.१०० )धन्वन्तरीच्या ग्रंथांचे अध्ययन करणारे, शल्यशस्त्रचिकित्सातज्ञ.

**धान्वीरक**–पु., **रोग० धनुःस्तम्भः** ( का, भोजनक. )
धनुर्वात.

**धापयन्ती**–वि., **पाययन्ती** ( सुचि. २४.९२ )
वासराला पाजणारी.

**धामक**–न., **खनिज० कान्तलोहम्** ( रा. १३.२८ )
कांतलोह. पोलाद.

**धामन्**–न., **सारभागः, उत्कृष्टांशः** ( चनि. ६.९ )
सारभाग. उत्कृष्ट अंश.
**स्थानम्** ( असंसू. २३.४ ) स्थान.
**शारीरं तेजः** ( अहसू. ७.७६ ) शरिरातील तेज.

**धामार्गव**–पु., **ऋषि० बडिशः** ( चसू. १२.७ )
एक ऋषि. बडिश.
पु.,न., **वनस्पति० पीतघोषकः** ( चक. चक.४.३; सुउ. ४७.३७ ) **राजकोशातकी** (हे.) **कोशफलम्** (अरु. अहक. १.३५ ) **धामार्गवगुणाः – तिक्तं मधुरमुष्णं पक्वामाशय-शोधनं वृष्यं वमनकृद्वातकफघ्नं गरगुल्मोदर-कासघ्नं श्लेष्माशयस्थितकण्ठवक्त्रस्थकफजरोगघ्नं व्रणरोपणं च** (चक. ४.४-५; सुसू. ४३.८; अहक. १.३५; ध. १.१८९ )
हिं.–घिया तोरई, नेनुआ.
म.–**घोसाळे.**
गु.–गलका.
बं.–हस्तिघोषा, धुन्दुल.
त.–यानैपीर्क्कु.
फा.–खियार.
घोसाळे, गिलके, पिवळे घोसाळे, पिवळे कडु

दोडके. गुण–कडु, गोड, उष्ण, आमाशय व पक्वाशय शुद्ध करणारे वांतीकर. वातकफनाशक. कफस्थानांतले, घशातले तोंडातले कफज रोग खोकला गुल्म उदरनाशक व्रणरोपक शुक्र-धातूला हितकर.

**–कल्प**–पु., **अध्याय०** ( चक. ४ )
अध्यायाचे नाव. यात कडु घोसाळ्याचे कल्प दिले आहेत.

**–फल**–न., **पीतघोषकफलम्, वमनद्रव्येष्वेकम्** ( चवि. ८.१३५ )
पिवळे. कडु दोडके-घोसाळे वांती करणाऱ्या द्रव्यातील एक.

**धार**–वि., **आन्तरिक्षजलेष्वेकम्, धाराभिः पततीति धारं जलम्, तत्कारतौषारहैमेभ्यः प्रधानतमं लघुत्वात्। तद्गाङ्गसामुद्रभेदेन द्विविधम्। गाङ्गं सर्वदा सेव्यं सामुद्रं त्वाश्वयुजे सेव्यम्** ( सुसू. ४५.७ )
द्र० 'जाल' धारांचे पाणी. पावसाचे पाणी. आकाशजलांपैकी एक. धारांनी पडणारे पाणी. ते गार बर्फ दव यांच्या पाण्यापेक्षा श्रेष्ठ. कारण ते हलके असते. प्रकार २ गांग व सामुद्र. गांग नेहमी प्यावे. सामुद्र फक्त आश्विनात प्यावे.

(**धारा**)–स्त्री., **उपक्रम० सेकः** ( चचि. १४.२१७ )
उपचार. द्रव औषधींचे सिंचन. धार धरणे.
**प्रवाहः** ( सुशा. ८.११ ) प्रवाह, धार.
**शस्त्रधारा, भेदनलेखनव्यधनविस्रावणच्छेदनोपयोगि–प्रधाना शस्त्रसंपत्। तत्र शस्त्रधारा भेदनानां मासूरी, लेखनानामर्धमासूरी, व्यधनानां विस्रावणानां च कैशिकी छेदनानामर्धकैशिकी च** ( सुसू. ८.१० )
शस्त्राची धार. फोडणे, खरडणे, विंधणे (भोक पाडणे) स्राव करणे, तुकडा करणे, या कामी उपयुक्त धार. शस्त्राचा एक गुण. फोडण्याला मसुराइतकी, खरडण्याला अर्ध्या मसुराइतकी, भोक पाडणे व स्राव करण्याला केसाइतकी, तुकडे करण्याकरता अर्ध्या केसाइतकी असावी.
**वनस्पति० गुडूची** ( ध. १.१ ) गुळवेल.

**धारण**–पु., **स्तम्भः धार्यते गृहोपरि स्थितपटलादि अनेन इति धारणः स्तम्भः** ( अहसू. ७.५२ ) खांब.

**धारणी**–स्त्री., **विद्या०नेत्ररोगेऽञ्जनमन्त्रः, " नमश्चक्षुःपरिशोधनराजाय तथागतायार्हते सम्यक्सम्बुद्धाय। ॐ चक्षुःप्रज्ञाचक्षुर्ज्ञानचक्षुर्विज्ञानचक्षुर्विशोधय स्वाहा "** ( असंसू. ८.९९-१०० )
डोळ्याच्या रोगात अंजन करण्याचा मंत्र वर आहे.
न., **ज्ञानस्य बुद्धौ स्थैर्यम्** ( चवि. ८.१८ )
बुद्धीत ज्ञान स्थिर रहाणे.
**इन्द्रियाणां धारणशक्तिः** ( चशा. ३.१० )
इंद्रियांची धारणशक्ति.
**वातकर्म० विधारणम्** ( सुसू. १५.४ ( १ )
वाताचे धारणकार्य.
**बलदानम्** ( सुसू. १४.३ ) बलदान. बल देणे.
**वेगावरोधः** ( अहसू. ४.७ )
मळ मूत्र आदि विसर्जनाचा आलेला वेग अडवणे. त्याचा रोध करणे.
**अस्थिकर्म० शरीरस्य स्तम्भवद्धारणम्** ( असंसू. १.२३; अहसू. ११.४ )
हाडाचे कर्म. शरीर खांबाप्रमाणे उभे धारण करणे–धरून ठेवणे.
वि., **बीजधारणकारकः** ( **संयावः** ) ( चचि. ३०.१०७ )
बीजधारण कारक. ( हारोळी, सांजा. )

**धारणात्मक**–वि., **हृदयगृहीतवस्तूनाममोचकः** ( सुशा. ३.२५ )
मनाने कांही घेतले की ते कधीही न सोडणारा. कोणाबद्दलही झालेला ग्रह न सोडणारा.

**धारणीया**–स्त्री., **वनस्पति० धरणीकन्दः** ( रापरि. ७.४२ )
लांबट, चांगला रानकंद.

**धारा**–स्त्री., **सेकः** ( चचि. १४.२१७ )
शेक. सिंचन. शिंपण.

**–कदम्ब**–पु., **वनस्पति० कदम्बभेदः** ( ध. ५.१०५ )
द्र० 'कदम्ब' कळंबाचा प्रकार.

**–गृह**–न., **यदुपरि जलधाराः सततं पतन्ति तत्, अम्बुपूर्णसदनम्** ( चचि. ३.२६१; सुउ. ४७.६० ) **दाहप्रशमनार्थमत्र निवासः प्रशस्तः** ( चचि. ४.१०६; चचि. २४.१५९ )
कारंजाचे स्नानगृह. ज्याचेवर सतत जलधारा पडतात. ते. भोवताली दशदिशांना पाणी असलेले घर. यात दाह नाशाकरिता रहाणे चांगले.

**–धरात्यय**–पु., **शरदृतुः, धाराधरा मेघाः, तेषामत्ययोऽन्तः यस्मिन् सः** ( चसू. ६.४४ ) शरदृतु.

**–फल**–पु., **वनस्पति० मदनः** ( रा. ८.२३० )
गेळफळ.

**(-फला)**–स्त्री., वनस्पति० कोशातकी (रा. ७.२८८) दोडके, गिलके, घोसाळे.

**-फलक**–पु., वनस्पति० कर्मारः (रापरि. ११.१३) पिवळे व धारा असलेले फळ.

**-संस्थापन**–न., शस्त्रधारास्थिरीकरणम् (सुसू. ८.१३; असंसू. ३४.३७) शस्त्राची धार स्थिर करणे.

**धारिन्**–वि., आयुः शरीरं धारयति पूतितां गन्तुं न ददातीति (चसू. १.४२) शरीरेन्द्रियसत्त्वात्मसंयोगरूपात् शरीरधारणाद्धारि (चसू. ३०.६) आयुष्य. धारक. शरीर धारण करतें, कुजू देत नाही ते. शरीर, इंद्रिय, मन, आत्मा यांच्या संयोगरूपी धारणामुळे धारि.

**(धारि)-लोहित**–न., जीवशोणितम्, रक्तधातुः (चवि. ४.७) जीव शोणित, विशुद्धरक्त, रक्तधातु.

**धारोष्णदुग्ध**–न., सद्योदोहनेन गृहीतमसंस्कृतमुष्णस्पर्शं पयः। इदं वातपित्तज्वरहरम् (चचि.३.२३८) पित्तरक्तावृतेऽनिले प्रशस्तम् (चचि. २९.८२) तद्गुणाः– धारोष्णं गोपयो बल्यं शीतं लघ्वमृतोपमं दीपनं त्रिदोषघ्नं च। धाराशिशिरं गोपयस्त्याज्यम् (भा. प्र.) धारोष्ण दूध. गाईच्या स्तनांतून नुकतेच काढलेले गरम दूध. हे वात पित्त ज्वरनाशक. पित्तरक्तावृत वातावर प्रशस्त. गुण--गाईचे धारोष्ण दूध बलवर्धक थंड हलके अमृतासारखे. अग्निदीपक, त्रिदोषघ्न. धार काढलेले थंड दूध घेऊ नये.

**धार्तराष्ट्र**–पु., पक्षि० हंसभेदः, तदण्डं क्षीणरेतः कासहृद्रोग क्षतेषु हितं मधुरमविदाहि सद्यो बलकरं च (चसू. २७.८५)

हंसाचा प्रकार. त्याचे अंडे क्षीणशुक्र खोकला हृद्रोग व उरःक्षत यांवर हितकर. गोड, छातीत जळजळ न करणारे व त्वरित बलकर.

**-पदी**–स्त्री., वनस्पति० हंसपादी (रा. ५.१६८) राजहंस.

**धावन**– न., पार्श्वतो गमनम्. (चक्र. चइं. ३.४) बाजूने जाणे.

उपक्रम० प्रक्षालनम्, धावति शुध्यति इति धावनम् प्रक्षालनम् (सुचि. २२.३१; असंसू. ३८.५३) धुणे, शुद्ध करणे.

**(धावनी)**– स्त्री., वनस्पति० कण्टकारी (चचि. ३.१८७,-२२४; ध. १.९५) रिंगणी पृश्निपर्णी (ध. १.९०) पिठवण.

**धी**–स्त्री., प्रज्ञाभेदः यश्च बाह्याध्यात्मिकानां भावानां हिताहितपरिच्छेदविभागकारी, अरुणः (चक्र. चशा. १.९८; अहृसू. १.२६) बुद्धीचा प्रकार. बाह्य आध्यात्मिक भावांचे हितकर व अहितकर असे विभाग करणारी बुद्धि.

**धीतिका**–स्त्री., शुष्कगोमयादिकृतोऽग्न्याश्रयः (चसू. १४.६१) शेगडी, शेकोटी, गोवऱ्या लाकडे यांनी पेटवलेल्या अग्नीचे आश्रयरूप भांडे.

**धीमत्**–वि., अनुक्तदुरुक्तोहापोहलक्षणबुद्धियुक्तः (सुसू. ३४.२०) न सांगितलेल्या किंवा विपरीत सांगितलेल्या विधानाबद्दल ऊहापोहात्मक बुध्दि आहे असा. योग्योयोग्य, हिताहितकर भावांचा ऊहापोह करणाऱ्या बुध्दीने युक्त.

**धीर**–पु., वनस्पति० ऋषभः (ध. १.१२५) अष्टवर्गापैकी एक.

**(धीरा)**–स्त्री., वनस्पति० शिंशपा (रा. ९.१९८) शिसव. काकोली (रा ३.१६६) कावळी. तेजोवती (रा. ३.३९४) मालकांगोणी, प्रकार.

**धुकधुकास्वन**–पु., लक्षण० कर्णगतो धुकधुकेति शब्दः (असंशा. १०.८) कानात होणारा धुकधुक असा शब्द.

**धुक्षण**–वि., अग्निदीपनम्, धुक्ष सन्दीपनक्लेशनजीवनेषु इति भौवादिको धातुः, धुक्ष्यते सन्दीप्यतेऽनेनेति धुक्षणम् अग्निसन्दीपनम्; (चवि. ६.१२) अग्नि प्रदीप्त करणे.

**धुन्वत्**–वि., विक्षिपत् 'धुञ् कम्पने' इति स्वादौ, (ड. सुउ. ६१.१३) इकडे तिकडे हातपाय (अंगे) हालवणारा.

**धुरन्धरी**–स्त्री., वनस्पति० धवः (धपरि. ५.४) धावडा.

**धुस्तूर**–पु., वनस्पति० धत्तूरः (र. २५.९०) धोतरा.

**धूप**–पु., उपक्रम० धूपनम् (चनि. १.३६) अगुर्वादिधूपः (अहृसू.३.१५) धूपानुधूपप्रतिधूपाश्चेति कर्मभेदात् त्रिविधो धूपः। स च जाङ्गमस्थावराश्रयत्वाद् द्वियोनिः। तद्द्रव्याणि–वचाकुष्ठक्षौमकहिङ्गुघृतसिद्धार्थकसर्पत्वग्देवनिर्माल्यमक्षतादीनि च। रक्षोघ्नचतुरङ्गिकनन्दकश्रीधूपदशाङ्गमाहेश्वरादयो बहुविधा धूपाः (का. धूपकल्प) धूप. धुरी देणे. उपचार. प्रकार ३– धूप अनुधूप

**नव्य**–पु., पुनर्नवाभेदः, रक्तपुनर्नवा ( रा. ५.४०८ ) द्र० ' पुनर्नवा ' पुनर्नवाप्रकार. तांबडा पुनर्नवा.

**नष्ट**–वि., अन्तर्हितम् ( सुउ. ४७.१२ ) नष्ट.

**–कर्मक्रियागुण**–वि., लक्षण० नष्टानि कर्माणि क्रिया–गुणाः क्रियाफलानि च यस्य ( सुउ. ४७.१२ ) ज्याच्या कर्म व क्रियांचे गुण नष्ट झाले आहेत असा. गुणकर्म नष्ट झालेला. क्रियागुण–क्रियाफळ.

**–निद्र**–वि., लक्षण० विगतनिद्रः ( अहृसू. ५.६४ ) झोप येत नसलेला.

**–पिष्ट**–वि., बन्ध० नष्टचाञ्चल्यादिरूपः पारदो मूर्तिबद्धरूपः सन् नष्टपिष्टः इत्युच्यते ( र. ८.६६ ) पाऱ्याचे चंचल इत्यादी गुण नष्ट होऊन तो आकार युक्त होऊन पिठासारखा होणे हे नष्टपिष्टलक्षण.

**–पिष्टि**–स्त्री., नष्टपिष्टत्वम् ( र. ८.६६ ) नष्टपिष्ट होणे, पहा ' नष्टपिष्ट.'

**–पुष्पा**–वि., विगतार्तवा ( काधात्री चि. ) रजःस्राव बंद झालेली. पाळी बंद झालेली.

**–मानस**–वि., लक्षण० अपस्मरणः ( ड. सुउ. ४६.१२ ) स्मरणनाश, स्मृतिनाश झालेला.

**–रक्त**–न., आर्तवनाशः ( सुशा. २.२२ ) रजःस्राव—पाळी बंद होणे.

**–संज्ञ**–वि., लक्षण० संज्ञानाशस्वरूपव्याधिलक्षण–विशेषयुक्तः ( चसू. १४.१७ ) संज्ञानाश झालेला, शुद्धीवर नसलेला. विषयग्रहणशक्तिरहितः ( सुक. ५.४३ ) विषय ग्रहण शक्ति नसलेला, शुद्धीवर नसलेला.

**–सिर**–वि., समुद्धृतसिरासन्ततिः ( चक्र. चसि. ३.११ ) सिरांचे जाळे काढून टाकलेला.

**–सूर्य**–वि., सूर्यस्यादर्शनं यत्र सूर्यालोकरहितम् ( अहृसू. ३.२४ ) सूर्याचे दर्शन होत नाही तेव्हा. ऊन नसताना.

**–स्वरता**–स्त्री., लक्षण० आत्यन्तिकः स्वराभावः ( सुसू. ३२.४ ) आवाज अगदीच बसणे. आवाज निघू न शकणे.

**नस्तस्**–( अव्य., ) नासिकांतः, नासिकायां वा नाकात, नाकातून.

( **नस्त** ):–**कर्मन्**–न., नस्यकर्म ( चसि. ९.८९; चनि. १.३६ )नाकात औषध घालणे.

**–तर्पण**–न., उपक्रम० नस्यम् ( चसू. १३.२५ ) एक उपचार. नाकात औषध घालणे.

**–प्रच्छर्दन**–न., शिरोविरेचनम् ( चसू. १.८५ ) डोक्याचे रेचक, डोक्याची ओकारी करणारे औषध डोक्याची शुध्दि करणारे औषध.

**नस्य**–न., उपक्रम० व्रणस्य षष्ट्युपक्रमेष्वेकः, स्नैहिकं नस्यम्, इदं रुजावत्सु वाताऽऽविष्टेषु रुक्षेषूर्ध्वजत्रुजेषु व्रणेषु च देयम् (सुचि. १.१२६) तन्निरुक्तिः— औषधमौषधसिद्धो वा स्नेहो नासिकाभ्यां दीयते इति नस्यम् ( चसि. ९.८८; सुचि. ४०.२१; अहृसू. २०.१ )

तद्विविधम्— शिरोविचनं स्नेहनं च।

तदपि पञ्चविधम्— नावनमवपीडो ध्मापनं धूमः प्रतिमर्शश्च ( चसि. ९.८९ ) तथा—नस्यं शिरोविरेचनं प्रतिमर्शोऽवपीडः प्रधमनं च (सुचि. ४०.२१) तत्र प्रतिमर्शः स्नेहनस्यम्। स मर्शप्रतिमर्शभेदेन द्विधा, कल्कादिभिरवपीडः, तीक्ष्णकल्कादिभिर्मूर्धविरेचनः, विरेचनश्चूर्णो ध्मानम् ( अहृसू. २०.७ ) तत् त्रिविधम्— विरेचनं बृंहणं शमनं च ( अहृसू. २०.२; असंसू. २९.४ ) तत्र नावनं स्नेहनशोधनभेदेन द्विविधम्, अवपीडः शोधनस्तम्भनभेदेन द्विधा, धूमः प्रायोगिकवैरेचनिकस्नैहिकभेदेन त्रिविधः ( चसि. ९.९०–९२ ) तत्र शिरोविरेचनं स्तम्भसुप्तिगुरुत्वादिश्लैष्मिकशिरोरोगेषु शस्यते ( चसि. ९.९३; सुचि. ४०.२३; असंसू. २९. ५; अहृसू. २०. २,३ ) तर्पणं शिरःकम्पार्दितादिवातात्मिकेषु रोगेषु शस्यते ( चसि. ९.९४ ) शमनं च रक्तपित्तादिरोगेषु केशदोषेषु च शस्यते ( चसि. ९५; असंसू.२९.७; अहृसू. २०.७ ) बृंहणं वातजशूले तथा सूर्यावर्तस्वरक्षयनासास्यशोषवाक्सङ्गकृच्छ्रोन्मीलनाऽवबाहुकेषु शस्यते ( असंसू. २९.७; असंसू. २०.७ ) विरेचननस्यद्रव्याणि – यथास्वं यौगिकाः स्नेहाः सर्षपतैलादयः, मरिचशुण्ठ्यादिसाधितकल्कक्वाथादयः, मधुसैन्धवमासवाश्च ( असंसू. २९.७; अहृसू. २०.५ ) बृंहणद्रव्याणि – धन्वमांसोत्थरसा रुधिरं मोचरसादिर्बृंहणद्रव्यसाधितस्नेहाश्च ( असंसू. २९.६; अहृसू. २०.६ ) शमनद्रव्याणि धन्वमांसोत्थरसादीनि शमनौषधसाधितस्नेहादीनि क्षीरोदकान्यणुतैलं च ( असंसू. २९.७;

अहृसू. २०.६ ) दोषभेदान्नस्यद्रव्याणि – केवलवाते वसा, पित्ते सर्पिः, सवाते कफे तैलम् समारुते पित्ते मज्जा च ( सुचि. ४०.५६–५७ ) नस्यकालः – दोषभेदाद्–वातरोगेष्वपराह्णे रात्रौ च, श्लेष्मरोगेषु प्रातः, पित्तरोगेषु च मध्याह्ने नस्यं देयम्. ( अहृसू. २०.१३ ) ऋतुभेदात् – शीते दिनमध्ये ग्रीष्मे सायं वर्षासु च विद्यमाने आतपे नस्यं देयम् ( अहृसू. २०.१५ ) वयोभेदाद् – ऊनसप्ताब्देऽतीताशीतिवत्सरे च नस्यं न देयम् ( अहृसू. २०.३०; असंसू. २९.२१ ) प्रतिमर्शस्त्वाबाल्याद् यावदायुस्तथा तल्पोत्थितादिचतुर्दशसु कालेषु शस्यते ( सुचि. ४०.५१ ) नस्यमात्रा – तत्र मर्शस्य दश बिन्दव उत्कृष्टा मात्रा, अष्टौ बिन्दवो मध्यमा मात्रा, षट् बिन्दवश्च कनिष्ठा मात्रा । प्रतिमर्शाऽवपीडशिरोविरेचनानामुत्तममध्यमकनिष्ठा मात्रा अष्टषट्चतुर्बिन्दवः ( सुचि. ४०.३६; अहृसू. २०.१० ) नस्यप्रदानविधिः – उत्तानशयानस्य प्राक्कृतावश्यकस्य किञ्चित् प्रलम्बशिरसः किञ्चित् पादोन्नतस्य नरस्य नासापुटे स्नेहं दद्यात् । ग्रीष्मे प्राक्सूर्ये, शीते मध्यसूर्ये च नस्यं दद्यात् (चसि. ९.९८–१००) नस्यान्ते वाक्शतमुत्तानं तिष्ठेत् । अनन्तरं कण्ठशुद्धये धूममुष्णाम्बु कवलांश्च सेवेत ( अहृसू. २०-२२ ) नस्यस्य हीनातियोगादयः– सम्यग्योगे सुखोच्छ्वासः स्वप्नबोधाक्षपाटवानि भवन्ति ( सुचि. ४०.३३- असंसू. २९.३८; अहृसू. २०.२३ ) अतियोगे कण्डूगुरुताप्रसेकारुचिपीनसा इन्द्रियविभ्रमाश्च भवन्ति ( सुचि. ४०.३४; अहृसू. २०२३; असंसू. २९.१८) अयोगेऽक्षिस्तब्धता नासास्यशोषो मूर्धशून्यता च भवति ( सुचि. ४०.३५ )

नस्यव्यापदः– हीनातिमात्रादिभिस्तृष्णोद्गारादयो दोषनिमित्ता दोषक्षयजाश्च व्याधयो भवन्ति। ( सुचि.४०.४८ )

नस्यायोग्याः – तोयमद्यगरस्नेहपीतानां भुक्तभक्तशिरःस्नातस्तु कामानां स्रुतासृजां दत्तबस्तीनां शुद्धानां च न देयम् । तथाऽनार्तवे दुर्दिनेषु च न देयम् ( चसि. २.२०; सुचि. ४०.४७; असंसू. २.१२) नस्येनोर्ध्वजत्रुजा रोगा शाम्यन्ति। इन्द्रियाणां वैमल्यमास्यसौगन्ध्यं च भवति। हनुदन्तशिरोग्रीवात्रिकबाहूरसां वलं वलीपलितखालित्यनाशश्च व्यङ्गानां भवति ( सुचि. ४०.५४–५५) नस्यशीलिनो घनोन्नतप्रसन्नत्वक्स्कन्धग्रीवास्य–वक्षसो दृढेन्द्रिय अपलिता भवन्ति ( चसू. ५.५७-६२; अहृसू. २०.३९; कासिद्धि. ४ ) नाका संबंधी. औषध किंवा औषधी स्नेह नाकाने दिले जाणे. दोन प्रकार. डोक्याचे रेचक व डोक्याचे स्नेहन. पुन्हा पाच प्रकार. नावे वर आहेत. प्रकार तीन. विरेचन, बृंहण. शमन, विरेचन-नस्य चटणी ( अवपीड ) चूर्ण ( ध्मान ) व धूम अशा तीन प्रकाराने करतात. २ बृंहण–रस ( अवपीड ) तेल ( प्रतिमर्श ) धूम ( स्नैहिक ) या तीन प्रकारांनी. ३ शमन–रस ( स्तंभन ) स्नेह ( प्रतिमर्श ) धूम ( प्रायोगिक ) यांनी करतात. रेचक नस्य–मान डोके जखडणे सुन्न जड असणे डोक्याचे कफाचे विकार यात उपयोगी. बृंहण ( पौष्टिक )–डोक्याचा कंप शूल स्वरनाश नाक डोळे यांचे वातज रोग अवबाहुक तोंड वाकडे होणे इत्यादी वाताच्या रोगांवर देतात. शामक नस्य–रक्तस्राव इत्यादी व केसाचे दोष यांवर योजतात. रेचक द्रव्ये –रेचक द्रव्यांनी सिद्ध स्नेह, मोहरी इत्यादिकांची तेले,मिरी सुंठ यांची चटणी काढा रस चूर्ण मध सैंधव आसवे. ( पौष्टिक ) द्रव्ये– रूक्ष देशातील प्राण्यांचे मांसरस रक्त मोचरस इ० पौष्टिक द्रव्यांनी साधित स्नेह. शामक नस्य-वर सांगितलेले मांसरस स्नेह दूध पाणी अणुतेल. दोष दृष्टीने द्रव्ये–केवल वातात वसा. पित्तात तूप. सवातकफात तेल. सवातपित्तात मज्जा.
**नस्याचा काळ**–वातरोगात तिसऱ्या प्रहरी रात्री, कफरोगात सकाळी, पित्तरोगात दुपारी, थंडीत दुपारी, उन्हाळ्यात रात्री, व पावसाळ्यात ऊन्ह असताना द्यावे.

**वय**–सातवर्षांपेक्षा कमी व ऐंशी वर्षानंतर नस्य देऊ नये. प्रतिमर्श नस्य मात्र बाल्यावस्थेपासून मरेपर्यंत. तसेच आंथरूणातून उठल्यापासून निजेपर्यंत केंव्हाही द्यावे.

**मात्रा**–मर्शाची दहा थेंब मोठी, आठ मध्यम, सहा कनिष्ठ मात्रा. प्रतिमर्श अवपीड रेचक यांची क्रमशः आठ, सहा चार बिंदु होय.

**विधि**—उताणे निजवून डोके मागे खाली करून पाय किंचित वर करून स्नेह द्यावा. १०० अंक मोजून होईतों उताणे पडावे. नंतर घसा साफ करण्यास ऊन पाण्याच्या गुळण्या धूम्रपान करावे.

**योग**—नस्य योग्य झाले तर सुखाने श्वासोच्छ्वास, झोप, जागे होणे घडते, इंद्रिये तल्लख रहातात. **नस्य अति** झाले तर—खाज, जडपणा, बेचव, तोंडाला पाणी, पडसे, व इंद्रियांना त्रास. **नस्य कमी झाले तर** डोळे स्तब्ध, नाक तोंड सुकतात, डोके सुन्न होते. **आपत्ति**—तहान ढेकरा दोषवृद्धीचे व दोषक्षयाचे नवे विकार. **नस्याला अयोग्य**—पाणी, मद्य, कृत्रिम विष, स्नेहपान केलेला, जेवलेला, स्नान करणारा, व डोक्यावरून केलेला, रक्तस्राव, रेचक वामक बस्ति देऊन शुद्ध झालेला यांना देऊ नये. तसेच ऋतूला विरुद्ध दिवस असताना व सूर्यदर्शन होत नाही अशा दिवशी देऊ नये. **नस्याचे सुपरिणाम**—मान व डोके यांतील विकार शमतात, इंद्रिये निर्मळ, तोंडाला सुगंध, हनुवटी दांत डोके मान खांदा बाहू छाती यांना शक्ति येते, वळ्या, सुरकुत्या, केस पिकणे, टक्कल वांग नाहीसे होतात. नस्य नेहमी सेवन करणाराची छाती, चेहरा, मान, खांदे, भरीव वर आलेले प्रसन्न दिसतात. इंद्रिये बलवान् असतात.

**—कर्मन्**—न., **नासाद्वारेण भेषजदानम्** ( चसू. ५.५७ ) नाकाने औषध देणे. नाकाने औषधोपचार करणे.

**—शीलिन्**—वि., **नस्याभ्यासी** ( अहसू. २०.३९ ) नाकाने तेल इ० औषध नेहमी घेणारा.

**नस्यानर्ह**—वि., **नस्यायोग्यः** ( सुचि. ४०.४७ ) नस्य घेण्यास अयोग्य मनुष्य.

**नहुष**—पु., **नृप० सोमवंशीयोऽसौ** ( काफकचि. ) सोमवंशांतील एक राजा.

न., **वनस्पति० तगरम्** ( ध. ३.५३ ) तगर.

**नाकलायक**—पु., **वनस्पति० व्रीहि** ( रा. १६.१०२ ) व्रीही जातीचा तांदूळ.

**नाकिनी**—स्त्री., **ग्रह० रेवती** ( का. रेवतीकल्प. ) एक बालग्रह रेवती.

**नाकुलान्ध्य**—न., **नेत्ररोग० नकुलान्ध्यम्** ( सुउ. १.३९ ) डोळ्याचा एक रोग. ज्या आंधळेपणात डोळे मुंगसासारखे चमकतात तो रोग.

**नाकुली**—स्त्री., **वनस्पति० सर्पसुगन्धा** ( जज्जट ) ( चचि. ३.२६७; इन्दु. असंसू. ४२ ) मुंगुसवेल. सर्पाला सुगंधी वाटणारी; मुंगुसकांदा, सापसंद, नावळी.

**चविका** (चक्र. चचि. ३.२६७; इन्दु. असंसू. ४२; र. १७.४३ ) चवक.

**रास्ना** ( चचि. २३.२१२; इन्दु. असंसू. ४२ ) रास्ना.

**शङ्खिनी** ( ध. १.२५६ ) शंखिनी, सांखवेल.

**नाकुलीगुणाः— कटुस्तिक्तोष्णा त्रिदोषघ्नी मूषकविषकृमिघ्नी च** ( ध. ४. १०३ ) **वृश्चिकसर्पविषनाशिनी, व्रणरोपिणी** ( र. १८.६२–६३ )

हिं.—नकुलकन्द, चन्द्रा.

**म.—मुंगुसकांदा, सांपसंद, नावळी.**

गु.—नकुलकन्द, नोळवेल.

बं.—नाकुली, चन्द्रा.

त.—चिवन्त, अमल्पोरि.

फा.—विषमुंगरी, छोटाचांद.

**गुण**—तिखट, कडु, उष्ण, त्रिदोषनाशक, उंदीर; विंचू, सर्प यांचे विषनाशक, कृमिनाशक, व्रणरोपक.

**—द्वय**—न., **रास्ना तृणरास्ना च** ( चचि. ९.४६ ) रास्ना, गवतीरास्ना.

**नाकुलीयक**—पु., **वनस्पति० नाकुली** ( असंसू. ८.१२२ ) मुंगुसवेल, सापसंद, नावली.

**नाक्षत्रिकनामन्**—न., **जन्मनक्षत्रसम्बन्धकृतं नाम** ( चशा. ८.५० ) जन्माच्या वेळी असलेल्या नक्षत्राला अनुसरून ठेवलेले नाव.

**नाग**—पु., **खनिज० सीसकम्** ( र. १.४१ ) सिसे.

**वनस्पति० नागकेसरः** ( सुसू. ४५.१२; र. २१.२५–२८ ) नागकेशर.

**ताम्बूलम्** ( र. २४.१३६ ) विडा, विड्याचे पान.

**एरण्डः** ( र. २१.२५–२८ ) एरंड.

**सल्लकी** ( असंशा. ४.३८ ) साळई.

**ग्रह० भुजङ्गमः** ( सुउ. ६०.३६ ) एक ग्रह.

**देवयोनि० वासुक्यादिः** ( सुसू. ५.२१ ) वासुकी इत्यादी देवयोनि.

**पशु० गजः** ( सुचि. २८.२६ ) हत्ती.

न., **सुगन्धि० नखम्** ( इन्दु. असंउ. ८ ) नखला.

**खनिज० सीसकम्** ( ध. ६.२१ ) सिसे.

**नागकेसरम्** ( सुसू. ४६.२८७; ध. २.४८ ) नागकेशर.

**वत्सनाभः** ( ध. ७.१२८ ) बचनाग.

**( नागा )**—स्त्री., **वनस्पति० नाकुली** ( र. २ मुंगुसवेल.

**–कन्द**–पु., वनस्पति० हस्तिकन्दः ( रापरि. ७.३६ ) हत्तीकंद.

**–करण्डक**–पु., हस्तिदन्तविनिर्मितं सिद्धौषधिस्थापनपात्रम् ( र. १७.८३–८४ ) हस्तिदंती करंडा. हत्तीच्या दातांचा केलेला. सिध्दौषधि भस्म मात्रा इ० ठेवण्याचा करंडा.

**–कर्ण**–पु., वनस्पति० एरण्डभेदः, रक्तैरण्डः ( र. २५.९८; रा. ८.४४६ ) द्र० 'एरण्ड' एरंड, तांबडा एरंड.

**–किञ्जल्क**–न., वनस्पति० नागकेसरम् ( ध. २.४८ ) नागकेशर.

**–कुमारी**–स्त्री., वनस्पति० गुडूची ( ध. १.२ ) गुळवेल.

**–कुमारीका**–स्त्री., वनस्पति० मञ्जिष्ठा ( रा. ६.१७ ) मंजिष्ठ.

**गुडूची** ( रा. ३.२ ) गुळवेल.

**–केसर**–न., वनस्पति० तद्गुणाः– तिक्तं अल्पोष्णं लघु कफवातघ्नं बस्तिरुग्विषवातास्रकण्डूशोफकण्ठशीर्षरुग्वरं च ( ध. २.४८ )

हिं.—नागकेशर.

म.—**नागकेशर.**

गु.—नागकेशर.

बं.—नागेश्वर.

त.—नाकेचुरं, नाकप्पू.

नागकेशर. **गुण**–कडु, थोडे उष्ण, हलके, कफवातनाशक, बस्ति, घसा, डोके यांचा शूळ, वातरक्त सूज, खाज व विषनाशक.

**–गन्धा**–स्त्री., वनस्पति० नाकुली ( रा. ७.१५२ ) मुंगुसवेल, सापसंद.

**–गर्भ**–न., खनिज०. सिन्दूरम् ( ध. ३.१०१ ) शेंदूर.

**–चपल**–न., अर्कदुग्धेन मर्दितं त्रिंशत्पलमानं सीसकं तावत्कालं पुटयेद् यावत्कालपर्यन्तं तत् कर्षावशिष्टं स्यात्। एतत् कर्षावशिष्टं सीसकं नागचपलमित्युच्यते। ( र. ८.४२–४३ )
नागचपल. शिशाचा एक कृत्रिम प्रकार. एकशे वीस तोळे शिसे रुईच्या चिकात घोटून त्याला पुट द्यावे. पुनःपुन्हा ही पुटे द्यावीत. शिसे जळून कमी होत जाते. एक तोळा शिसे शिल्लक राहीपर्यंत पुट द्यावे ह्या शिल्लक शिशाला नागचपल म्हणतात.

**–चम्पक**–पु., वनस्पति० वनचम्पकः, तद्गुणाः– कटुरुष्णो वर्ण्यश्चक्षुष्यो वह्निस्तम्भको वातकफघ्नो व्रणरोपी च ( रा. १०.२४२ )
रानचाफा, नागचाफा. **गुण**–तिखट उष्ण वर्ण व डोळे यांना हितकर व्रणरोपक वातकफनाशक अग्निनाशक.

**–छत्रा**–स्त्री., वनस्पति० नागदन्ती ( रापरि. ५.२६ ) नागदंती.

**–ज**–न., खनिज० सिन्दूरम् ( ध. ३.१०१ ) शेंदूर.

**–जिह्वा**–स्त्री., खनिज० मनःशिला ( ध. ३.९६ ) मनशीळ.

**–तुम्बी**–स्त्री., वनस्पति० भूतुम्बी ( रा. ७.२४१ ) भुईभोपळा. एक जातीचा भोपळा.

**–दन्ती**–स्त्री., वनस्पति० काष्ठपाटला, इयमपस्मारे नावनार्थमुपयुक्ता ( चक्र. चचि. १०.४२ )
लकडी पाडळ. ही मिरगीवर नाकात घालण्यास उपयुक्त. सूर्यकमळाचा प्रकार.

**दन्तीभेदः** (चक्र. चचि. २३.२४१) दातीचा प्रकार.

**दन्ती** ( ड. सुसू. ३८.१६–१७ ) दाती.

**इन्द्रवारुणीभेदः** ( सुक. ६.३ ) कवंडळ, इंद्रावण.

**पर्वपुष्पिका** (अरु.) **पर्वपुष्पी** ( हे. अहसू. १५.२८ ) एक वनस्पती.

**श्वेतपुष्पी**– ( ध. १.२५२; असंसू. १६.२९ ) मोठ्या कवंडळाचा प्रकार.

**नागदन्तीगुणाः**– कटुस्तिक्ता रूक्षा मेधाकृत् पाचनी शुभदायिनी वातकफापहा विषदोषघ्नी गुल्मशूलोदरव्याधिकण्ठदोषनिकृन्तनी च ( रापरि. ५.२६ )
**गुण**–तिखट, कडु, रूक्ष, पाचक, धारणाशक्ति वाढविणारी, वातकफनाशक, विषदोषघ्न, गुल्म, उदरशूल, घशातील दोषनाशक, शुभदायक.

**–दमनी**–स्त्री., वनस्पति० जम्बूः ( रापरि. ५.२४ ) जांभूळ.

**वन्ध्यकर्कोटकी**– ( ध. १.१८६ ) वांझकर्टोली.

**बलामोटा**– ( ध.परि. ४.३ ) सूक्ष्म मुळांची हिरवी वनस्पती. जयन्ती, ब्राह्मी.

**नागदन्ती**– ( र. २५.१०९ ) पहा 'नागदन्ती.'

**–पत्नी**–स्त्री., वनस्पति० लक्ष्मणा ( रापरि. ७.५५ ) पांढरी रिंगणी. चांगला कंद असलेली लक्ष्मणा नावाची वनस्पती.

**-पित्त**—न., हस्तिनः पित्तम्, एतत्सिद्धं तैलमपस्मारे पानाभ्यङ्गेषु प्रशस्तम् ( सुउ. ६१.२४-२५ )
हत्तीचे पित्त. याने तयार केलेले तेल अपस्मारात पिण्यास व अभ्यंग म्हणून चांगले.

**-पुरग**—न., खनिज० सीसकम् ( रा. १३.२० )
शिसे.

**-पुष्प**—न., वनस्पति० नागकेसरम्
( चचि. १४.१६१; सुउ. ४७.३०; सुसू. ३८.४५; ध. २.४८ ) नागकेशर.
**नागकेशरपुष्पसमपुष्पो महातरुः** ( ड. सुसू. ३८.२४–२५ )
नागकेशराच्या फुलांसारखे फूल असलेला मोठा वृक्ष.

**-पुष्पफला**—स्त्री., वनस्पति० कूष्माण्डम्
( रा. ७.२६९ ) कोहळा.

**-पुष्पिका**—स्त्री., वनस्पति० यूथिकाभेदः
( रा. १०.२५१ ) द्र० 'यूथिका'
जुईप्रकार.

**-फल**—पु., वनस्पति० पटोलः ( रा. ३.७४ )
पडवळ.

**-बला**—स्त्री., वनस्पति० क्षतक्षीणे पुष्ट्यायुर्बलाऽऽरोग्यकरी । ( चचि. ११.९१ ) पानात्यये शमनार्थं प्रशस्ता (सुउ.४७.३४) शोषघ्नी (का राजक्ष्मचि.)
**तद्गुणाः— मधुराम्ला कषाया कटुस्तिक्तोष्णा** (बल्या) ( असं. ) वातघ्नी (क्षतक्षीणहिता) ( असं. ) **कण्डूतिकुष्ठव्रणपित्तविकारघ्नी च** ( ध. १.२८४; असंसू. १२.८३; र.२०.१९–२२ )
हिं.—गुलसकरी.
म.—**गांगेटी, तुकाटी, खरेटी.**
गु.—गंगेटी, काण्टालोबल.
बं.—गोरखचाकुले, गोरखचाकुलिया.
फा.—शांलेते, दरित.
नागबला. चिकण्याचा प्रकार. उरःक्षतात पुष्टि बल आरोग्य व आयुष्यवर्धक. क्षयनाशक व मद्यपानजन्य विकार नाशक. **गुण**—गोड, आंबट, तुरट, तिखट, कडु, उष्ण, वातघ्न, अतिकंडू, कुष्ठ, व्रण व पित्तविकारघ्न.

**-बलाप्रयोग**—पु., नागबलारसायनम्, अनेन शोषो नश्यति ( सुउ. ४१.५७ )
नागबला-चिकण्याचे रसायन, क्षयनाशक.

**-बलाभ्यास**—पु., नागबलायाः सततं शीलनं नाम सेवनम् ( असंसू. १३. ३ )
चिकण्याचे ( नागबलेचे ) सतत सेवन.

**-बलारसायन**—न., योग० नागबलाया मूलानां श्लक्ष्णपिष्टचूर्णस्य सततं सेवनम् । रसायनमिदं वयःस्थापनं शतायुःकरं च ( चचि. १(२).११ )
चिकण्याचे नागबलेचे रसायन. चिकण्याच्या मुळाचे गुळगुळीत पिष्ट केलेल्या-चूर्णाचे सतत सेवन तारुण्य ठेवणारे व शतायुषी करणारे असते.

**-बलासर्पिस्**—न., घृत० पित्तरक्तक्षतक्षयकासघ्नं च ( असंचि. ५ )
चिकण्याचे तूप—पित्तरक्त यांचे विकार, उरःक्षत, क्षय व खोकलानाशक.

**-बुद्धि**—पु., प्राचीनो रसाचार्यः ( र. ६.४९–५३ )
एक प्राचीन रसशास्त्रातला निष्णात.

**-बोधि**—पु., प्राचीनो रसाचार्यः, रससिद्धिप्रदायकोऽसौ ( र. १.२–५ )
प्राचीन रसशास्त्रातला निष्णात, शिष्याला पारदकर्मात सिद्धि देणारा.

**-बोधिन्**—पु., प्राचीनो रसाचार्यः (र. १५.५८-६५)
प्राचीन रसशास्त्रतज्ञ.

**-भू**—स्त्री., वनस्पति० क्षुद्रपाषाणभेदः (रा. ५.२१५)
लहान पाषाणभेद.

**-मूत्र**—न., हस्तिमूत्रम् ( सुसू. ४५.२२६ )
हत्तीचे मूत्र.

**-मृत्तिका**—स्त्री., वनस्पति० सल्लकी (असंशा. ४.३८)
साळई.

**-रङ्ग**—न., फल० नारङ्गः (चसू. २७.१५६; ध. ५.२०)
संत्रे. नारिंगे.

**-रेणू**—पु., खनिज० सिन्दूरम् ( रा. १२.१६० )
शेंदूर.

**-लता**—स्त्री., वनस्पति० ताम्बूलम् (र. २७.३४-३६)
विड्याच्या पानाची वेल.

**-वधू**—स्त्री., पशु० हस्तिनी ( सुउ. ६४.१२ )
हत्तीण.

**-वल्ली**—स्त्री., लता० ताम्बूलम् ( र. ११.११० )
विड्याच्या पानाची वेल.

**-विन्ना**—स्त्री., वनस्पति० इन्द्रवारुणीभेदः ( सुउ. ६२.३१ ) द्र० इन्द्रवारुणी
कवंडळ प्रकार, इंद्रावणप्रकार.
**नागदन्ती—श्वेतपुष्पी** ( इन्दु. असंउ. ९ )
मोठ्या कवंडळाचा प्रकार.

**-शुण्डी**-स्त्री., वनस्पति० डङ्गरी ( ध. १.१८१ )
तांबडा भोपळा, डांगर.

**-सुंदर**-पु., पारदयोग० पारदगन्धकनागयुक्तः अयमतिसारगुदभ्रंशार्शःप्रवाहिकानाशनः ( र. १६.३६-४१ )
पारा गंधक व शिसे युक्त योग. हा अतिसार, गुदाचे अंग बाहेर येणे मूळव्याध, आंवरक्त नाशक.

**-स्फोता**-स्त्री., वनस्पति० दन्ती ( रा. ६.३३८ )
दाती.
नागदन्ती ( रापरि. ५.२६ )
मोठ्या कवंडळाचा प्रकार.

**-हनु**-पु., सुगन्धि० नखम् ( ध. ३.५८ ) नखला.

**-हन्त्री**-स्त्री., वनस्पति० वन्ध्यकर्कोटकी ( रा. ३.२७३ )
वांझकटोली.

**नागर**-पु.न., मुस्ताभेदः पिण्डमुस्तः ( ध. १.४१ )
नागरमोथाप्रकार. पिंड्यामोथा, गोल मोथा.
वनस्पति० शुण्ठी ( चसू. २.१८; ध. २.८२; असंसू. १६.२९ ) सुंठ.
मुस्ता ( चक्र. चसू. २.२१ ) नागरमोथा.
गर्जरम् ( ध. ४.६९ ) गाजर.

**-धान्याम्भस्**-न., शुण्ठीधान्यकानां जलम् (क्वाथः) ( अहसू. १९.३३ )
सुंठ व धणे यांचे पाणी ( काढा. )

**-मुस्ता**-स्त्री., वनस्पति० मुस्ता ( रा. ६.६१ )
नागरमोथा.

**नागरादिक्वाथ**-पु., योग० नागरदीप्यकादिसिद्धोऽयं क्वाथः शूलहरः ( सुउ.४२.१२७ )
सुंठ ओवा इत्यादींचा काढा, शूलनाशक.

**नागरादिघृत**-न., घृत० नागरत्रिफलादिसिद्धं घृतम् सर्वोदरघ्नं दीपनीयं च घृतमिदम् ( चचि. १३.११५-११६ )
सुंठ त्रिफळा इत्यादी सिद्धतूप. अग्निदीपक सर्व उदरनाशक.

**नागराद्यचूर्ण**-न., योग० इदं पित्तग्रहण्यां शस्तम् ( चचि. १५.१२९-१३२ )
सुंठ इत्यादी वनस्पतींचे चूर्ण पित्तज ग्रहणीत प्रशस्त.

**नागराह्व**-न., वनस्पति० शुण्ठी ( रा. ६.१३० ) सुंठ.

**नागादिवर्ति**-स्त्री.,पारदयोग०नागपारदामलकीमौक्तिकयुक्ता इयं पित्ताभिष्यन्दाधिमन्थादिरोगघ्नी ( र. २३.३९ )
शिसे पारा आवळा मोतीयुक्त योग वात-पित्ताने डोळे येणे ते अधिक वाढणे यावर उपयुक्त.

**नागाराति**-स्त्री., वनस्पति० वन्ध्यकर्कोटकी ( रा. ३.२७३ ) वांझकटोली.

**नागारि**-स्त्री.,वनस्पति० वन्ध्यकर्कोटकी ( ध. १.१८५ )
वांझकटोली.

**नागार्जुन**-पु., प्रसिद्धो रसाचार्यः ( र. ९.६४-६६ )
प्रसिध्द पारदशास्त्रातला तज्ञ आचार्य.

**नागाह्व**-पु., वनस्पति० नागचम्पकः ( रा. १०.२४२ )
द्र० 'चम्पक' ( ध. ५.१४२ ) वनचम्पकः
नागचाफा, रानचाफा.

**(नागाह्वा)**-स्त्री., वनस्पति० ताम्बूली ( धपरि. ३.३ )
विड्याच्या पानाची वेल.
लक्ष्मणा ( रापरि. ७.५५ )
चांगला कंद असलेली लक्ष्मणा नावाची वनस्पती.
न., वनस्पति० नागकेसरम् ( असंसू. १६.८; अरु. हे. अहसू. १५.१४ ) नागकेशर.

**नागाह्वय**-न., वनस्पति० नागकेसरम् ( असंसू. १६.३७; अहसू. १५.४३ ) नागकेशर.

**नागेन्दु**-स्त्री., वनस्पति० सठी ( रा. ६.८७ )
कचोरा.

**नागेन्द्रद्विज**-पु., हस्तिदन्तः ( र. २३.६ )
हस्तिदंत. हत्तीचा दांत.

**नागोदर**-पु., रोग० उपशुष्ककः तत्सम्प्राप्तिलक्षणम्-उपवासादिव्रतपराया गर्भिण्याःकदाहारेण वातप्रकोपकाहारविहारेण प्रतिमासमार्तवातिस्रवणेन च गर्भो वृद्धिं न प्राप्नोति । कालान्तरमवतिष्ठते । कुक्षिश्च परिहीयते। अस्पन्दनश्च भवति गर्भोऽल्पस्पन्दनो वा ( चशा. ८.२६; असंशा. ४.१३ र. २२.२८ )
सुकट गर्भ, खुरटा गर्भ, सल. **संप्राप्ति व लक्षणे**- उपवास इत्यादी व्रत आचरणारी कदन्न खाणाऱ्या स्त्रीला वातवृद्धीमुळे प्रत्येक महिन्याला रजःस्राव अतिशय होत असेल तर तिचा गर्भ चांगला वाढत नाही, गर्भ खुरटतो. पुष्कळ काळ गर्भाशयात राहतो. वाढलेली कूस कमीकमी होते. गर्भाचे स्पंदन थोडे होते किंवा मुळीच होत नाही. मात्र कुजत नाही.
**सुश्रुते तु, शुक्रशोणितं वायुनोपरुद्धमवक्रान्तजीवं कदाचित्प्रलीयमानमकुथितमवतिष्ठते तस्य नागोदर इति संज्ञा** ( सुशा. १०.५७ )
सुश्रुतात शुक्र व आर्तव यांच्या संयोगानंतर

बनलेला जीवप्रविष्ट गर्भ वायूने वाढण्याऐवजी क्षीण होतो. केव्हा अगदी लहान होतो व न कुजता तसाच गर्भाशयात रहातो तो नागोदर.

**नागिनी**–स्त्री., वनस्पति० नागदन्ती ( रापरि. ५.२७; र. ११.९०–९२ ) नागदंती.
लक्ष्मणा ( रापरि. ७.५५ )
कंद असलेली या नांवाची वनस्पती
ताम्बूलम् ( र.२६.८–१० ) विड्याच्या पानांची वेल.

**नागीय**–न., वनस्पति० नागकेसरम् ( रा. ६.७३ ) नागकेशर.

**नाड**–पु., पत्रपुष्पफलानां सुषिरः काण्डः ( चसू.१. ७३ ) पाने, फुले, फळे यांचा पोकळ दांडा. पोकळ कांडे.

**नाडिका**–स्त्री., काल० नाडयति भ्रंशयति कालं स्वपरिमाणेन इति नाडिका, त्रयोविंशतिः कलाः ( असंसू. ४.५ )
एक ठराविक काळ. तेवीस कला.

**नाडी**–स्त्री., दन्तनाडी ( सुचि. २२.२६ )
दांतातला नाडीव्रण.
नलिका, नालम् ( चशा. ६.२३ ) ताम्रादिरचितनलिका (सुसू. २७.१७) तांबे इ० ची केलेली नळी.
वंशादिनलिका ( अहसू. १७.१० )
वेळू बांबूची नळी.
प्रणालिका अन्त्रनाडी ( सुनि. ७.१७ )
आंतडे अंत्र हीच जणू नाडी.
शारीर० स्रोतः ( चवि. ५.९; असंशा. ६.५० )
शरिरातील निरनिराळे द्रव, वायु वाहणाऱ्या पोकळ वाहिन्या.
शाक० नाडीचः तद्गुणाः– तिक्तं शीतं कटुंपाकि कफपित्तहरं च ( चसू. २७.९७-९८ )
एक भाजी. कडु, पचल्यानंतर तिखट, थंड, कफपित्तहर. वनस्पति० गण्डदूर्वा (ध. ४.१४५) गांठी दूर्वा.
रोग० नाडीव्रणः ( चसू. १३.४६; सुनि. १०.१० )
तन्निरुक्तिः– व्रणान्नाडीवत्-प्रणालीवत् पूयो वहतीति नाडी ( सुनि. १०.१० )
तन्निदानं सम्प्राप्तिश्च–पक्वशोफस्या भेदाद्व्रणेऽपथ्यसेविनश्च पूयो मांसादीननुप्रविश्य दूरमभिधावति ( असंउ. ३४ )
तत्स्थानम् — त्वङ्मांससिरास्नायुसन्ध्यस्थिकोष्ठमर्म्माणि चेत्यष्टौ स्थानानि ( सुनि. १०.९ )
तत्सङ्ख्या—वातजा, पित्तजा, कफजा, सन्निपातजा शल्यजा चेति पञ्च ( सुनि. १०.१०; असंउ. ३४ ) द्वन्द्वजास्तिस्रः वातपित्तजा पित्तकफजा वातकफजेति ( ड. सुनि १०.१० )
तत्र वातजा परुषसूक्ष्ममुखी सशूला विवर्णा रात्रौ अभ्यधिकफेनिलोद्वमा च ( सुनि. १०.११; असंउ. ३४ ) पित्तजा तृड्ज्वरदाहकृत् पीतोष्णपूतिपूयस्रावा दिवाऽत्यधिकस्राविणी च (सुनि. १०.११; असंउ. ३४ ) कफजा विपुलसान्द्रधवलपिच्छिलस्रावत्वती स्तिमितरुक् कठिना कण्डूला निश्यभ्यधिकक्लेदा च ( सुनि. १०.१२; असंउ. ३४ )
सन्निपातजा दाहज्वरश्वसनमूर्च्छनवक्त्रशोषकारिणी ( सुनि. १०.१३; असंउ. ३४ )
शल्यजा – अनाहृतमन्तःस्थितं शल्यं नाडीं करोति साऽल्पमुष्णं तनु फेनाऽनुविद्धं सास्रं सरुजं पूयं नित्यं वहति ( सुनि. १०.१४; असंउ. ३४ )
तत्साध्यासाध्यता-त्रिदोषप्रभवाऽसाध्या शेषाश्चतिस्रः यत्नसाध्याः ( सुचि. १७.१७ ) भेद्यरोगोऽसौ ( सुसू. २५.५-७ )
नाडीव्रण. जखमेच्या आत नळी बनते व तिच्यातून पू येतो तो. **निदान व संप्राप्ति**—पिकलेली सूज फोडली नाही तर व व्रण असताना अपथ्य केले तर पू मांस इत्यादी धातूत खोल जातो व नळी तयार करतो.
**स्थान**—त्वचा, मांस. शीर, स्नायु, सांधा, हाड, कोठा, व मर्मस्थळ ही आठ स्थाने. **संख्या**-वात, पित्त, कफ, त्रिदोष, व शल्य यांपासून पाच. दोन दोषांचे तीन. दोषजांमध्ये त्या त्या दोषांची चिन्हे असतात अशी नाडी
**वातजनाडी**–खरखरित, बारीक तोंडाची, शूलयुक्त, फिकट वर्णाची, व रात्री फेस अधिक वाहणारी.
**पित्तजनाडी**—तहान, ज्वर, दाहकारक, पिवळा, कढत व घाण पुवाचा स्राव करणारी, स्राव दिवसा अधिक.
**कफजनाडी**—पुष्कळ, घट्ट, पांढरा, बुळबुळित स्राव होणारी, थांबून पीडा होणारी, कठीण, खाजयुक्त, व रात्री अधिक क्लेदवहन करणारी.
**संनिपातजनाडी**—दाह, ज्वर, श्वास, मूर्छा व तोंड कोरडे पडते अशी.
**शल्यज नाडी**—बाहेर न काढता आतच शल्य ही नाडी करते. थोडे व उष्ण, पातळ रक्तयुक्त, पीडा करीत करीत नित्य प

**साध्यासाध्य**–त्रिदोषज असाध्य, इतर यत्नाने साध्य; हा भेद्यरोग आहे.

**नाडी-कलाय**–पु., सुवर्चलाभेदः, सकुलाक्षकः, **तद्गुणाः – तिक्तं पाके कटुर्ग्राही वातलः कफपित्त-जिच्च** ( अहृसू. ६.७७ )
एक भाजी. कडु, पचल्यानंतर तिखट, मळ बांधणारी, वातुळ, कफपित्त जिंकणारी.

**–कल्पनविधि**–पु, गर्भनाभिनाडीच्छेदनविधिः ( चशा. ८.४४ )
गर्भाची नाळ कापण्याचा विधि–व्यवस्था.

**–घ्न**–वि., **नाडीहरम्** ( सुचि. १७.३८ )
नाडीनाशक–हारक.

**–तिक्त**–पु., **वनस्पति० किराततिक्तः** ( रा. ९.५२ )
काडेचिराईत.

**–द्वय**–न., **नलनालः** एरण्डपत्रनालश्च (सुसू.१६.२९)
नाडी जोडी. दोन नाड्या. नळाची व एरंडाच्या पानाची.

**–धूम**–पु., **उपक्रम० नाड्या गृहीतो धूमः । कासप्रतिश्यायवतां शिरःपीडावतां नासायाः स्रावे हृदि च ताम्यति सति अष्टाङ्गुलोन्मितया दशाङ्गुलोन्मितया वा नाड्या धूमः प्रयोज्यः** ( चचि. १८.६५-६६ )
नाडीने घेतलेला धूर. एक उपचार. खोकला, पडसे, डोकेदुखी, नाकातून स्राव, चक्कर येते तेव्हा आठ अंगुळाच्या किंवा दहा अंगुळाच्या नळीने धूर प्यावा.

**–भङ्गशाक**–न., **नाडीपल्लवशाकम्** ( सुसू. २०.१३ )
एक भाजी.

**–मार्ग**–पु., **कण्ठस्रोतोमार्गः कण्ठनाड्यधोमार्गः** ( र. १४.५२ )
घशाच्या खालचा मार्ग, आमाशय व फुप्फुसाकडे जाणारा. असे दोन्ही मार्ग.

**–मुखाकृति**–वि., **लक्षण० नालिकामुखवदाकृतिमत्** ( सुनि.२.१० )
नळीच्या तोंडासारखी आकृती असलेला.

**–यन्त्र**–न., **यन्त्र० सुषिरमेकानेकमुखं स्रोतोगत-शल्योद्धरणार्थं रोगदर्शनार्थं क्रियासौकर्यार्थमाचूषणार्थं च स्रोतोद्वारप्रवेशि यथायोगदीर्घं यन्त्रम् विंशतिप्रकारकमिदम्** (सुसू. ७.१३; असंसू. ३४.९; अहृसू. २५.११ ) एक यंत्र. पोकळ अनेकतोंडांचे. स्रोतसातील रोग पाहण्यास तेथे असलेले शल्य काढण्यास शस्त्रक्रिया सुलभतेने करण्यास व चोखण्यास स्रोतसाच्या द्वारात जाणारे स्रोतसाच्या लांबीरुंदीला अनुसरून यथायोग्य यंत्र प्रकार वीस.

**–व्रण**–पु., **नाड्या युतो व्रणः** ( सुचि. १.४१ )
नाडीने युक्त व्रण. ज्या व्रणात नळी आहे असा.

**–व्रणप्रक्षालनयन्त्र**–न., **यन्त्र० तत् षडङ्गुलं बस्तियन्त्राकारं मुखतोऽकर्णिकं मूलमुखयोरङ्गुष्ठ-कलायप्रवेशस्रोतस्कम्** ( असंसू. ३४.१३ )
नाडीव्रणाची नळी धुण्याचे यंत्र. हे सहा अंगुळे लांब बस्तियंत्राच्या आकाराचे पण चकती नसलेले मुळांत आंगठा व तोंडात वाटाणा बसेल असे पोकळ यंत्र.

**–स्वेद**–पु., **स्वेद० मूलफलपत्रशुङ्गादीनां मृगशकुन-पिशितशिरःपदादीनामुष्णस्वभावानां यथार्थमम्ल-लवणस्नेहोपसंहितानां मूत्रक्षीरादीनामुत्क्वथितानां स्वेदनद्रव्याणां बाष्पमनुद्वमन्त्यां कुम्भ्यां शरेषीका-वंशाद्यन्यतमकृतया गजाग्रहस्तसंस्थानया व्याम-दीर्घया व्यामार्धदीर्घया वा व्यामचतुर्भागाऽष्टभा-गमूलाऽग्रपरिणाहस्रोतसा सर्वतो बिल्वैरण्डादि-वातहरपत्रसंवृतच्छिद्रया द्विस्त्रिर्वा विनामितया नाड्या वातहरसिद्धस्नेहाभ्यक्तगात्रो बाष्पमुपहरेत् । अनेन विहतचण्डवेगोऽनृजुगामी बाष्पस्त्वचम-विदहन् सुखं स्वेदयति** ( चसू. १४.४३; सुउ. २१.७; असंसू. २६.१० )
नळीशेक. शेकाची द्रव्ये मुळे फळे पाने डेखे, ( अंकुर ) हरिणासारखे प्राणी पक्षी यांचे उष्ण स्वभावी मांस, डोके, पाय, आंबट स्निग्ध द्रव्ये मीठ, मूत्र दूध इत्यादींमध्ये उकळावी. भांड्याचे तोंड बंद असावे. बाजूला वेळूची नळी, मध्ये दोन तीन ठिकाणी बांक घेतलेली ( नागमोडी ) जोडावी. टोक हत्तीच्या सोंडेच्या तोंडासारखे असावे, नळी एक किंवा अर्धा वाव लांब तसेच ¼ वाव मुळाकडे व ⅛ भाग तोंडाकडे घेर असावा. त्यावर सर्व बाजूंनी बेल एरंड इत्यादी वातहर पाने गुंडाळावी, तोंडावरही ती थोडी यावी, वातनाशक द्रव्यांनी सिद्ध केलेल्या तेल तूप इ० नी अभ्यंग करून वाफ द्यावी. वरच्या प्रमाणे व्यवस्था करून वाफ दिली तर वाफेचा जोराचा वेग कमी होऊन ती थोडी वाकडी अशी अंगावर येईल व त्यामुळे त्वचेला चटका न बसता शेकले जाईल.

**–हिङ्गु**–न., **निर्यास० तद्गुणाः कटूष्णं दीपनं कफ-वातघ्नं विष्टम्भविबन्धामदोषानाहघ्नं च**(ध. २.४०)

हिंग—गोंदाचा एक प्रकार. गुण—तिखट, उष्ण, अग्निदीपक कफवातनाशक, वाताचा अवष्टंभ, मलावरोध, आमदोष, पोटफुगी नाशक.

**नाथ**-पु., **स्वामी, ईश्वरः** ( असंसू. २८.३६. )
स्वामी, ईश्वर, नाथ, मालक.

**नाद**-पु., **रोग० कर्णनादः** ( चचि. २६.१२७ )
कानातला आवाज.

**नादेय**- पु., **वनस्पति० वानीरः** ( रापरि. ९.१७ )
जलवेतस.

**काशः** ( रा ८.२०१ ) कासगवत.

**मुस्ताभेदः, पिण्डमुस्तः** ( ध. १.४१ )
नागरमोथा प्रकार, पिंड्या मोथा, गोलमोथा

**( नादेयी )** – स्त्री., **वेतसभेदः मेघपुष्पः** ( ध. ५.११७ )
जलवेतस. वेतसाचा प्रकार.

**जम्बूभेदः, काकजम्बूः** ( ध. ५.८४; रा. ११.१३२)
द्र० ' जम्बू ' लहान जांभूळ.

**वनस्पति० अग्निमन्थः** ( ध. १.१११ ).
अरणी, पांढरी टाकळी.

**मुस्ता** ( रा. ६.६१ ) नागरमोथा.

**जम्बूभेदः, जलजम्बूः** ( ड. सुचि. ४.३२ )
पाणजांभूळ, जांभूळ प्रकार.

**न., लवण० सैन्धवम्** (सुउ. ११.१६; ध. २.२५)
सैंधव.

**खनिज० अञ्जनम्** ( रा. १३.२१४ ) सुरमा.

**–जल**–न., **नद्या नदस्य वा जलम्; तद्गुणाः–वातलं रूक्षं दीपनं लघु लेखनं च । कासाञ्चन नदीनां जलमभिष्यन्दि मधुरं सान्द्रं गुरु कफावहं च** ( सुसू. ४५.७-३१ ) **वर्षासु नादेयं जलमग्राह्यम्** ( अहसू. ५.२० )
नदीचे किंवा नदाचे पाणी. **गुण**—रुक्ष, हलके, अग्निदीपक वातूळ दोष खरडून काढणारे, काही नद्यांचे पाणी स्राव वाढविणारे, गोड, थोडे घनसर जड, कफकर. वर्षाऋतूत नदीचे पाणी उपयोगी नाही.

**–मत्स्य**–पु.,**नदीजो मत्स्यः, रोहितपाठीनपाटलाराजीववर्मिगोमत्स्यकृष्णमत्स्यवागुञ्जारमुरलसहस्रदंष्ट्रप्रभृतयो नादेयाः। तद्गुणाः – मधुरा गुरव उष्णा वृष्याः स्निग्धा अल्पवर्चसो रक्तपित्तकरा मारुतापहाश्च** ( सुसू. ४६.११३-११४ )
नदीतला मासा. प्रकाराची नावे वर आहेत. **गुण**– गोड स्निग्ध जड उष्ण अल्प मळ निर्माण करणारा शुक्रधातूला हिताचा वातहर रक्तपित्त करणारा.

**नाना**–अव्य०., **बहुविधम्** ( रापरि. ७.२४ )
पुष्कळ प्रकारचा, नानाविध.

**–कन्द**–पु., **वनस्पति० कन्दग्रन्थिः** ( रापरि. ७.२४ )
गाठाळ गोल लव असलेला. विड्याच्या पानांप्रमाणे पाने असलेला कंद.

**–करण**–न., **अनेकभेदाभिन्नतापादनम् भेदकरणम्** ( सुनि. ६.२६ )अनेक भाग करणे.

**–त्व**–न., **पृथक्त्वम्** ( ड. सुउ. २९.१०० )
पृथक्पणा. वेगळेपणा.

**–द्रव्यात्मकत्व**–न., **अनेकद्रव्यसमुद्भूतत्वम् अनेकेभ्यो द्रव्येभ्यो लब्धतद्भावत्वम्** ( असंसू. ६.९७ )
अनेक द्रव्यांपासून उत्पन्न होणे. अनेक द्रव्यांनी युक्त असणे.

**–रुजा**–स्त्री., **लक्षण० वातादिकृततोददाहकण्ड्वादिवेदना** ( सुनि. १६. ५७ )
वात इत्यादी दोषांपासून उत्पन्न होणाऱ्या टोचणी आग खाज इत्यादी नाना प्रकारच्या वेदना.

**–रूप**–वि., **अनेकप्रकारम्** ( अहसू. १२.३० )
अनेक प्रकारचे, नाना प्रकारचे.

**–वर्ण**–**अनेकविधवर्णः** ( सुउ. ४०.८१ )
नानावर्णांचे, अनेक प्रकारच्या वर्णांचे.

**नानात्मक**–वि., **नानास्वभावम्, अनेककारणम्** ( हे अहसू. ९.१७ )
अनेक प्रकारचे, अनेक स्वभावांचे, अनेक कारणांचे.

**नानात्मज**–वि., **वातादिभिर्दोषान्तरासम्पृक्तैर्जायमानम्** ( चक्र. चसू. २०.१० )
वातादि दोषांबरोबर अन्य दोष संयुक्त असून त्यांनी एकत्र निर्माण केलेले.

**नान्दीमुख**–न., **फल० मुरजमुखाकृति खर्जूरद्राक्षाऽऽमलकादि, नान्दीमुखश्राद्धाय हितमेतत्** ( चशा. ८.३५ )
एक फळांचा गट. मृदंगाच्या आकाराची खजूर द्राक्ष आवळा इत्यादी फळे. ही नांदीमुख श्राद्धाकारिता हितकारक.

**( नान्दीमुखी )**–स्त्री., **धान्य० यविका इयं मधुरा स्निग्धशीतला च** ( चसू. २७.२२ )
एक कदन्न धान्य. गुण–गोड स्निग्ध व थंड.

**नापाक**—पु., वनस्पति० पद्मबीजम् ( ध. ४.१५९ )
कमलाचे बी, कमळबीज.

**नाभस**—वि., आकाशसम्बन्धि ( अहृसू. ९.१० )
आकाशसंबंधी. आकाशाचे.

**( नाभसी )**—स्त्री., छायाविशेषः इयं निर्मला नीला सस्नेहा सप्रभा च पञ्चच्छायानामन्यतमेयम् ( चइ. ७.१० )
आकाशीय छाया-ही निर्मळ निळी स्निग्ध प्रभायुक्त.

**–द्रव्य**–न., आकाशीयं द्रव्यम् ( अहृसू. ९.९ )
आकाश महाभूत अधिक असलेले द्रव्य.

**नाभसप्रकृति**—वि., ( परिव० ) आकाशभूतप्रकृतिः नाभसप्रकृतिको नरः शुचिश्चिरजीवी च भवति अस्य कर्णनासादिच्छिद्राणि महान्ति भवन्ति ( सुशा. ४.८० )
आकाश महाभूत अधिक असलेली प्रकृति. **गुण**–ही व्यक्ति शुचि व दीर्घायुषी असते. यांची कान, नाक तोंड इत्यादी छिद्रे मोठी असतात.

**नाभाग**–पु., मनुपुत्रः वैवस्वतमनोर्नवमः पुत्रः ( चचि. १९.४ )
मनूचा मुलगा. वैवस्वत मनूचा नववा मुलगा.

**नाभि**–स्त्री., शारीर० उदरावर्तः ( सुशा. ९.७ ) असौ मातृजोऽवयवः ( चशा. ३.६ ) पञ्चदशकोष्ठाङ्गेष्वेकम् ( चशा. ७.१० ) दशप्राणायतनेष्वेकम् ( चशा. ७.९ ) नाभ्यां विशेषेण प्राणा व्यवस्थिताः। यतश्च साऽन्तरग्न्यधिष्ठानम् ( सुशा. ७.५; असंशा. ६.२९) चतुर्विंशतिधमनीनां प्रभवस्थानम् (सुशा. ९.३) सिराणां प्रभवस्थानम् (सुशा. ७.३) देहे ज्योतिःस्थानम् ( सुशा. ४.५८ ) विशेषतः पित्तस्य स्थानम् ( अहृसू. १२.२ )
गर्भदेहवर्धनमूलस्थानम्—गर्भिण्या गर्भाशये गर्भनाभिनाडी गर्भस्य नाभ्यां प्रतिबद्धा भवति। नाड्यां चापरा, तया अपराख्यया नाड्या गर्भस्य पोषणं जायते। ( सुशा. ३.३२ )
बेंबी. उदरावर भोवऱ्यासारखा असलेला खळगा. बेंबीच्या भोवतालचा आंत्रभाग. ग्रहणी, अंतरग्नीचे पाचक पित्ताचे स्थान. चोवीस धमन्याचे उगमस्थान. शिरांचे उगम स्थान. गर्भाच्या शरीर वाढीचे मूळस्थान. गर्भिणीच्या गर्भाशयात गर्भाची नाभि नाडी ( नाळ ) गर्भाच्या बेंबीशी सांधलेली असते. नाळ वारेशी सांधलेली असते व वार गर्भाशयाशी सांधलेली असते. नाळीने गर्भाचे पोषण होते, हा मातेपासून तयार होतो. पंधरा कोष्ठाच्या अंगापैकी एक अंग. दहा प्राणांच्या स्थानांपैकी एक. नाभीत प्राण विशेषेकरून असतात. प्राण म्हणजे प्राणधारक घटक.

**–ग्रह**–पु., लक्षण० बस्त्यभिघातजनितो नाभेर्ग्रहः (चसि. ९.६ )
बेंबीचा खालचा भाग जखडणे. बस्तीवर आघात झाला असता हे होते.

**–ज**–वि., नाभौ जातम् ( चसू. १७.१०१ )
बेंबीत होणारे.
न., सुगन्धि० कस्तूरी ( र. २७.११७ ) कस्तूरी.

**–नाडी**–स्त्री., नाभिसंसक्ता नाडी ( चशा. ६.२३ ) गर्भस्य नाभिनालः ( सुशा. १०.१२ )
बेंबीला लागलेली नाडी, नाळ, गर्भाची नाळ.

**–नाल**–पु., न., नाभिसम्बद्धा नलिका ( असंउ. १ )
बेंबीला लागलेली नळी, नाळ.

**–प्रपीडन**–न., उपक्रम० नाभेः पीडनम् ( असंउ. २७.१५ ) बेंबी दाबणे, ओढणे.

**–प्रभवा**–वि., गर्भनाभिसम्भूता, नाभितः सम्भवो यस्याः सा प्रभवति इति प्रभवः उत्पत्तिः, अथवा प्रभवति अस्मात् इति प्रभवः उत्पत्तिकारणम् (सुशा. ९.३ )
गर्भाच्या बेंबीपासून झालेली.

**–बन्धन**–न.,उपक्रम० गर्भनाभेर्बन्धनम् ( चशा. ८.४४ )उपचार. गर्भाची बेंबी बांधणे.

**–मण्डल**–न., नाभिप्रदेशः ( सुसू. ५.२६-२७ )
बेंबीच्या भोवतालचा भाग.

**–मर्मन्**–न., मर्म० म्रियते पुरुषो यस्मिन्नभिहते तन्मर्म तत्स्थानम् उदरं, पक्वामाशययोर्मध्ये (सुशा. ६.६-२५) जातितः सिरामर्म ( सुशा. ६.७ ) सङ्ख्ययैकम्, मानतश्चतुरङ्गुलपरिमितम् ( सुशा. ६.२९ ) सद्यःप्राणहरमिदम् ( सुशा. ६.९; असंशा. ७.१० )
नाभी मर्म ज्याच्यावर आघात झाला असता मनुष्य मरतो ते मर्मस्थान, उदर.
पक्वाशय व आमाशय यांमध्ये सर्व लहान आंतडी व पक्वाशयापर्यंतचा मोठ्या आतडीचा भाग. हे एक सिरामर्म आहे. प्रमाण चार अंगुळे हे ताबडतोब प्राणहर मर्म आहे.

**-यन्त्र**—न., यन्त्र० दृढस्थूलविस्तृतमृत्पात्रमध्ये गर्तं कुर्यात्। तत्र पारदं गन्धकं च निदध्यात्। ततो गर्तस्य समन्ततोऽङ्गुलोच्छ्रायं कुड्याकारं बन्धं कुर्यात्। अनन्तरं तं गर्तं गोस्तनाकारमूषया न्युब्जया पिदध्यात्। तोयमृदाख्यया मृदा संधिं रुद्ध्वा सम्पाद्य वा संशोष्योपरिस्थितमल्लभागमाकण्ठं जलेन पूरयेत्। यन्त्रस्याधस्ताच्च वह्निं प्रज्वालयेत् ( र. ९,५९–६१ )
बळकट जाड पसरट मातीच्या भांड्यात एक खळगा करावा. त्यात पारा व गंधक ठेवावा. त्या नंतर त्या खळग्याभोवती एक अंगुळ उंच भिंतीसारखी पाळ करावी ती गाईच्या स्तनाच्या आकाराची करावी. मुसेने ती उपडी ठेवून झाकावी. पाण्याला प्रतिबंधक अशा मातीने संधिलेप करावा, व सुकवावे. मुसेच्या वरच्या खळग्यात पाणी भरावे, यंत्राच्या खाली अग्नि लावावा.

**-रुज**—स्त्री., लक्षण० नाभिप्रदेशे रुजा. ( चसि. ७.९ ) बेंबीपाशी वेदना.

**-विद्रधि**—पु., रोग० नाभिजो विद्रधिः, तल्लक्षणम् हिक्काऽऽटोपश्च ( सुनि. ९.१६–२० )
आंतडीचे गळू. **लक्षण**—उचकी व गुडगुड पोट फुगणे.

**-शूल**—पु., लक्षण० नाभिप्रदेशे शूलवद्वेदना ( चचि. १३.[illegible]१ )
बेंबीच्या भागात शूलासारखी वेदना.

**-हृदयान्तर**—न., नाभिहृदयोरन्तरम्। तच्च द्वादशाङ्गुलम् ( सुसू. ३५.१२ ) इदं दीर्घायुर्ज्ञापकम्
बेंबी व हृदय यांतले अंतर, बारा अंगुळे दीर्घायुष्याचे लक्षण.

**[नाभि]क**—न., शङ्खनाभिः, शङ्खस्य मध्यगता वर्तुलाकारा नाभिः। इयमक्षिरोगे उपयुक्ता (का. षट्कल्पाध्यायः) शंखाचा आतला वर्तुळाकार भाग. हा डोळ्याच्या रोगावर उपयुक्त.

**[ना]भिका)**—स्त्री., वनस्पति० कटभी ( रापरि. ९.३७ )
मालकांगोणी.

**[नाभिश]यर्ति**—स्त्री., लक्षण० नाभिशूलम् ( चचि. २०.८ )
बेंबीतला शूळ.

**[नाम]न्**—न., अभिधानम् (सुउ. ३९.९; असंउ. १) नाव.

**[नाम(धे]य)-करण**—न., संस्कार० शततमे दिने पूर्णे संवत्सरे वा शिशोर्नामाभिधानं कुर्यात्। तन्नाम पूज्यं त्रिपुरुषानूकमादिघोषवदक्षरमवृद्धं कृतमूष्मान्तं नक्षत्रदेवतायुक्तमनरातिप्रतिष्ठितं मङ्गल्यमन्तरन्तःस्थं निर्दुष्टं च स्यात् ( असंउ. १ )
नाव ठेवणे. एक संस्कार. शंभराव्या दिवशी किंवा एक वर्ष पूर्ण झाल्यावर मुलाचे नाव ठेवावे.

**-कर्मन्**—न., नामकरणम् नामकरणसंस्कारसमये क्रियमाणं होमादि कर्म ( चशा. ८.५०; ५१ )
नाव ठेवणे. नाव ठेवण्याचे वेळी करावयाचे होम इत्यादी कर्म.

**नाम्यमान**—वि., सङ्कोच्यमानम् ( अरु. हे; अहसू. ८.१६; असंसू. ११.३४ )
संकुचित आकुंचित.

**नारङ्ग**—पु., न., वनस्पति० फलविशेषोऽयम्
तद्गुणाः– अम्लं मधुरमुष्णं गुरु दुर्जरं (सु) हृद्यं विशदं भक्तरोचनं रोचनं बलकरं वातहरमामशूलश्रमकृमिशूलघ्नं च ( सुसू. ४६.१६१; ध. ५.२०; र. २३.१७-१८ )
हिं.—नारंगी.
म.-**नारिंग.**
बं.—नारंगालेबुक.
गु.—नारंगीलिंबु.
फा.—नारंज.
त.—किचिलि.
नारिंग, संत्रे. **गुण**—आंबट, गोड उष्ण जड, पचण्याला जड, चविष्ट, जेवणाला चव आणणारे, बलवर्धक हृदयाला हितकर स्वच्छ करणारे, श्रमहर, वातहर शूल, आमशूल, कृमिनाशक.
न., वनस्पति० गर्जरम् ( रा. ७.९८ ) गाजर.

**नारद**—पु., देवर्षि० रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः ( चसू. १.८; सुसू. ५.३१ )
देवर्षी. रोगनाशाबद्दल विचार विनिमय करण्याकरिता हिमालयाच्या उतरणीवर एकत्र झालेल्या महर्षींपैकी

**-कन्दक**—न., वनस्पति० गृञ्जनम् ( ध. ४.३७ )
गाजर.

**नाराचक**—न., स्थावरविष० त्वक्सारनिर्यासविषम्, इदं प्रसेकास्यदौर्गन्ध्यपारुष्यशिरोवेदनाकरम् ( असंउ. ४०; सुक. २.५-९ )
एक वनस्पतीविष. साल, नार, डिंक विषारी. हे तोंडाला पाणी सोडणारे, दुर्गंधी, रखरखीतपणा, डोकेदुखी करणारे.

चूर्ण० त्रिफलादन्त्यादिनिर्मितं चूर्णम्। इदमुदावर्तादिरोगभगन्दरार्शोघ्नम् ( काउदावर्त चि. )

चूर्ण. त्रिफला दारी इत्यादीयुक्त चूर्ण. पोट फुगणे, भगंदर, मूळव्याध इ० नाशक.

**नारायण**–पु., पारदयोग० पारदगन्धकगुग्गुल्वादिनिर्मितो रसयोगः । अयं दुःसाध्यकुष्ठक्षयभगन्दरशूलमूलगुल्मपाण्डुताग्रहणीमन्दाग्निनाशनः (र. २०.११८-१२१)
पाऱ्याचा योग. पारा गंधक गुग्गुळ इत्यादीयुक्त योग. हा कष्टाने साध्य होणाऱ्या कुष्ठ, क्षय, भगंदर, शूल, मूळव्याध, गुल्म. पांडु, ग्रहणी, मंदाग्निनाशक.

**( नारायणी )**–स्त्री.,वनस्पति० शतावरी (रा. ४.४३८) शतावरी.

**–चूर्ण**–न., योग० गवाक्षीशङ्खिनीतिल्वकादिनिर्मितं चूर्णम्, इदं विशेषेणोदररोगे उपयुक्तम् (चचि. १३.१२५-१२८)
कवंडळ सांखवेल रोध्र इत्यादीयुक्त चूर्ण. उदरात उपयुक्त.

**–तैल**–न., तैल० शतावरीप्रधानैर्द्रव्यैर्निर्मितं तैलम् । इदं वातव्याधिष्वभ्यङ्गार्थमुपयुज्यते (र. ११.१३३)
नारायण तेल. शतावरी प्राधान्याने असलेले इतर द्रव्ययुक्त तयार केलेले तेल. हे वातव्याधींमध्ये उपयोगी.

**–प्रिय**–न., वनस्पति० कालीयकम् (ध. ३.८)
चंदन, पिवळे चंदन.

**नारिकेल**–पुं., न., वनस्पति० फल० आनूपदेशोद्भवोऽयम् (चक. १.८) तद्गुणाः–मधुरं शीतलं गुरु हृद्यं स्निग्धं पित्तकरं (पित्तघ्नम्) (रा. ) बल्यं मांसदं वृष्यं बृंहणं बस्तिशोधनं तृष्णाशोषघ्नं च (चसु. २७.१३०; सुसू. ४६.१८०; ध. ५.७४; असंसू. ७.१७५; अहसू. ६.११९; र. १७,४३-४६) नारिकेलस्य मस्तकमज्जा नाम वृक्षाग्रमज्जा स्वादुरसपाकः शुक्रलः वातघ्नः कफवृद्धिकरः रक्तपित्तहरश्च. (सु. सू.४६.३१०)
हिं.–नारियल.
**म. नारळ, माड.**
गु.–नारिएल.
बं.–नारिकेल.
त.–तेंकु.
फा.–शोजहिन्दी; नारीयल.
**गुण**–गोड, थंड, स्निग्ध, जड, बलकर, हृदय व शुक्र यांना हितकर, मांसवर्धक पौष्टिक, पित्तनाशक, बस्तिशुद्ध करणारे, तहान व शोषनाशक. ह्या झाडाच्या शेंड्याच्या आत जो मज्जा असतो तो रसाने व पचल्यावर सुद्धा गोड, शुक्रवर्धक, वातनाशक, कफकर, आणि रक्तपित्तनाशक असतो.

**( नारिकेली )**–स्त्री., वनस्पति० नारिकेलः (र. १८.१११)
नारळ. माडफळ, पाणी व झाडी जास्त अशा प्रदेशात होणारे.

**–तैल**–न., स्नेह०तद्गुणाः–शीतं गुरु केश्यं श्लेष्मलं वातपित्तहरं च (ध. ६.१४१., असंसू. ६.१०९.,) वाजीकरं क्षीणधातुपोषणं मूत्राघातप्रमेहश्वासकासयक्ष्मघ्नं मेधाकृत् क्षतभरणं च (सुसू. ४५.१२०).
नारळाचे (खोबऱ्याचे) तेल. **गुण**–थंड, जड, केसांना हितकर, शुक्रधातुवर्धक, क्षीणधातुपोषक, बुद्धिवर्धक, जखम भरून आणणारे, वातपित्त नाशक, मूत्रनाश, प्रमेह, श्वास, खोकला, क्षय नाशक. कफवर्धक.

**–पाक**–पु,. नारिकेलकल्पः सौश्रुतः तद्विधिः— वाराहीमुसल्योः कन्दौ धत्तूरमहिफेनं धन्वयासं कपिकच्छुफलानि च पृथक् संचूर्ण्य कार्पासफलमज्जजातेन दुग्धेनाऽऽलोड्य सूर्यातपे शोषयेत् । एवं प्रत्येकं सप्तवारं भावयित्वा नारिकेलगर्भं पूरयेत् । तद्द्वारं च रुध्वा द्वात्रिंशद्गुणितदुग्धेनाऽन्तराऽन्तरा दर्व्या संवर्त्य द्रव्योपगमपर्यन्तं भाण्डे पचेत् । शीतं चूर्णीकृतं च घृतेन पचेत् । ततो जातीफललवङ्गैलाचूर्णं तस्मिन्निक्षिप्य गुटिकाः कुर्यात् । पाकोऽयं वातरोगप्रमेहघ्नो बल्यो वृष्यश्च । (र. २६.५६.६२)
**नारळपाक**–डुक्करकंद मुसळी, धोतरा, अफू, धमासा, कवचबीज ही वेगवेगळी चूर्ण करून ते चूर्ण कपाशीच्या बियाच्या दूधात कालवून सूर्याच्या उन्हात सुकवावे. या प्रमाणे सात वेळ करून नारळाच्या गोळ्यास भोक पाडून त्यात भरून भोक बंद करून ३२ पट दुधात शिजवावे, मधून मधून पळीने ढवळावे. घट्ट झाल्यानंतर उतरावे, थंड झाल्यानंतर वाटावे. नंतर तुपात परतावे. नंतर त्यात जायफळ लवंग वेलदोडा चूर्ण घालून गोळ्या कराव्या हा पाक बलकर, शुक्रवर्धक, वात रोग प्रमेह नाशक आहे.

**नारिकेलोदक**–न., नारिकेलमध्यगतम् उदकम् तद्गुणाः–स्निग्धं स्वादु हिमं हृद्यं दीपनं वृष्यं बस्तिशोधनं गुरु पिपासाघ्नं च (सुसू. ४५.४३–४४; ध. ६.३५१., अहसू. ५.१९)

नारळाचे पाणी गोड स्निग्ध थंड, जड, हृदय व शुक्रधातु यांना हितकर, अग्निदीपक, तहाननाशक व बस्ती शुध्द करणारे.

**नारिषण्ड**–पु., **स्त्रीनपुंसकः** ( चशा. २.१७ )
नपुंसक स्त्री.

**नारी**–स्त्री. **वनस्पति० अश्वबला, बल्वजसदृशपत्रा, द्रोणीप्रावेशिकरसायनेष्वेका** ( चचि. १ (४)७.)
एक वनस्पती. अश्वबला मेथी ? बल्वजा ( मोळ, लव्हाळा ) च्या पानासारखी पाने असलेली वनस्पती हिचा रस पिऊन पळसाच्या डोणीत निजण्याचा एक रसायनप्रयोग.

**–दधि**–न., **मानुषं दधि; तद्गुणाः—स्निग्धं मधुरविपाकं बल्यं गुरु सन्तर्पणं चक्षुष्यं दोषघ्नञ्च** ( सुसू. ४५.७३—७४ )
बाईच्या दुधाचे दही. **गुण**–स्निग्ध, पचल्यावर गोड जड, बलकर, पौष्टिक, डोळ्याला हितकर दोषनाशक.

**–प्रसङ्ग**–पु., **नारीष्वतिशयेन मैथुनार्थं प्रवृत्तिः** ( सुउ. २४.३ )
स्त्रीशी संभोगाची अतिप्रवृत्ति, अतिसंभोग.

**–स्तन्य**–न., **मानुष्याः ( स्त्रियाः ) दुग्धम्** ( सुसू. ४५.५७—५८ )
मनुष्य स्त्रीचे दूध, बाईचे दूध.

**नारीष्टा**–स्त्री., **वनस्पति मल्लिका** ( रा. १०.२२५ )
मोगरी.

**नाल**–पु.,न., **नलिका, दण्डः** ( अहसू. ३०-११; र. १०.२४ ) नळी, नळ, पोकळ दांडा.
**नाभिनालः** ( असंशा. ३ ( ७ ) ३४; र. ३.१२५ )
नाळ.
**स्रोतस्** ( सुउ. ५८.१५ ) रसरक्तादि वाहक स्रोतस
**मेहनम्–मिह्यते सिच्यते शुक्रमनेनेति मेहनार्थेऽपि नालपदं रूढं, सेचनावस्यन्दनयोरेकार्थत्वात्** ।
( सुउ.३७.११० ) लिंग, शिश्न.

( **नाली** ) स्त्री., **नाडी** ( चचि. २२.६ ) नळी.

**–पात**–पु., **नाभिनालपतनम्** ( असंउ. २ )
नाळ पडणे. मुलाची नाळ पडणे.

**–वंश**–पु., **वनस्पति० नलः** ( रा. ८.२२२ )
नळ. बोरू, बांबु, कळक.

**नालक**–पु., **धान्य० कलायः** ( ध. ६.१०३ )
वाटाणा.

**नालान्धमूषा**– स्त्री., **नालयुक्ता सम्पुटितमूषा गोस्तनाकारमूषा, नालयुक्तांधमूषा** (र. १८.२१-२२)
गाईच्या स्तनाच्या आकाराच्या दोन मुसांच्या पुडात नळी बसवून संधिलेप करून तयार केलेली बंद मूस.

**नालाभिबन्धन**–न., **नाभिनालस्य निबन्धनम्** ( असंउ. १ )
नाळ बांधणे. मुलाच्या बेंबीची नाळ बांधणे.

**नालिक**–न., **निर्यास० बोलम्** ( ध. ३.६२ अ )
बोळ.

( **नालिका** )–स्त्री., **शाक० गोनाडीचः** ( चसू. २७.१०१ ) **इयं स्तन्यजननी** ( सुशा. १०.३० )
**तद्गुणाः–वातला पित्तघ्नी मधुरा च** (सुसू. ४६.२७३)
**दीर्घनालरूपा कलम्बुसंज्ञा**, (अरु.) **नाड्याकारा सूक्ष्मसुषिरा बहुतोयजा श्लक्ष्णा च** । ( हे. ) **कलम्बादिवर्गोक्ता गुणाः – स्वादुः सलवणा रूक्षा वातश्लेष्मकरी गुरुः शीतला सृष्टविण्मूत्रा विष्टभ्य जरणशीला स्नेहाढ्या सती च नातिदोषला** (अहसू. १०.९३-९५)
एक भाजी. नळीच्या आकाराची सूक्ष्मच्छिद्रे असलेली पुष्कळ पाण्यात होणारी गुळगुळीत भाजी. **गुण**— गोड, थोडी खारट, रूक्ष, जड, थंड, जिरताना पोट फुगते, वात धरतो. शौचास व लघ्वीला साफ करते. वातकफकर तेल अधिक घातले तर थोडा दोष करते.
**कङ्कुष्ठभेदः, इयं पीतवर्णा गुरुः स्निग्धा श्रेष्ठा च** ( र. ३.१२०-१२२ )
कंकुष्ठप्रकार. पिवळ्या रंगाची जड स्निग्ध, श्रेष्ठ.

**–यन्त्र**–न., **यन्त्र० वालुकायन्त्रभेदः, तत्र वालुकास्थाने लवणं निक्षिप्य तस्मिन् लोहनालगतस्य निरुद्धसूतस्य पचनं कुर्यात्** । **अतिमृदुस्वेदोपयोगि यन्त्रमिदम्** ( र. ९.४३ )
नाडीयंत्र. वालुकायंत्राचा प्रकार. वाळूच्या ऐवजी मीठ टाकून त्यात लोखंडाची नळी, तिच्यात पारा बंद करून पचन करावे. अतिशय मृदु अग्नीच्या शेकाच्या उपयोगी.हें यंत्र आहे.

**–शाक**–न., **नालिका** ( सुसू. ४६.२७३ )
पहा ' नालिका '.

**नालिकेर**—पु., **वनस्पति० नारिकेलः** (सुसू. ४५.१२०)
नारळ.

**–तैल**–न., **स्नेह० नारिकेलतैलम्** ( सुसू. ४५.१२०; असंसू. ६.१०९ ) खोबऱ्याचे तेल.

**नालिकेरक**–पु., वनस्पति० नारिकेलः (धनि. ५.७४) नारळ.

**नालिकेरासव**–पु., आसुत० नारिकेलासवः अयं गुहाशयमांसभक्षणोत्तरमनुपाने विहितः। ( सुसू. ४६.४३३ ) खोबऱ्याचे आसव. गुहेत राहणाऱ्या प्राण्याच्या मांस भक्षणानंतर अनुपान चांगले.

**नावन**–न., उपक्रम० नस्यम् (चसू. ५.३९; अहसू. २.६ ) उपचार–नाकात औषध घालणे.

**नावनिकतैल**–न., नस्यार्थमुपयुक्तमणुतैलादिकम् ( चचि. ३.२५५ ) नाकात घालण्याकरिता उपयुक्त, अणुतेल.

**नासत्य**–पु., देवानांभिषजौ अश्विनीकुमारौ ( र. २०.८५ ) देवाचे वैद्य, अश्विनी कुमार.

**नासा**–स्त्री., शारीर०शीर्षप्रत्यङ्गम्, नासिका (सुशा. ५.४) नाक. डोक्याचे एक प्रत्यंग, उपांग.

वनस्पति० आटरूषः ( रा. ४.२९ ) अडूळसा.

**–गतरोगप्रतिषेध**—पु., अध्यायसंज्ञा ( सुउ. २३ ) अध्यायाचे नाव. यात नाकाच्या रोगांचे उपचार आहेत.

**–गतरोगविज्ञानीय**–वि., अध्यायसंज्ञा० ( सुउ. २२ ) अध्यायाचे नांव. यात नाकाच्या रोगांची माहिती आहे.

**–परिशोष**–पु., नासारोग० तल्लक्षणम् अस्मिन् घ्राणगतः कफो मारुतपित्ताभ्यां शोषितो भवति । तेन च ऊर्ध्वाधःश्वासोच्छ्वासकर्मण्यतीव क्लेशा भवन्ति ( सुउ. २२.१७-१८; र. २४.२० ) नाकाचा रोग. **लक्षण**—नाकात दुष्ट झालेला कफ वातपित्तांनी शुष्क होतो, त्या मुळे वर खाली श्वासोच्छ्वास करण्याला फार क्लेश होतात.

**–परिस्राव**—पु., नासारोग० तल्लक्षणम्–नासातोऽनवरतमविशिष्टवर्णं जलाभमच्छं स्रवति । रात्रौ चाधिकतरं स्रवणं भवति। अस्मिन् रोगे स्रावः शृंगाटकाख्यस्रोतसि प्रविलायितात् कफात् जायते ( सुउ. २२.१६-१७ ) नाकाचा रोग. **लक्षण**–नाकातून पाण्यासारखा स्वच्छ कोणताही रंग नसलेला स्राव सतत स्रवतो. रात्री फार स्रवतो. हा स्राव शृंगाटक नावाच्या स्रोतसात विलीन झालेल्या कफापासून होतो.

**–पाक**—पु., नासारोग० नासिकापाकः ( सुउ. २३.५; र. २४.२० ) अस्मिन् रोगे बाह्याभ्यन्तरी क्रिया पित्तहारिणी एव योज्या ( सुउ. २३.५.६ ) नाक पिकणे यावर अंतर्बाह्य उपचार पित्तनाशक सर्व करावे.

**–पिटिका**—स्त्री., नासारोग० नासापुटकम् तल्लक्षणम्–अन्तर्नासायां शुष्कः श्लेष्मा पिटिकावस्थां प्राप्नोति ( र. २४.२०; असंउ. २४ ) नाकातली पुळी. नाकात सुकलेला कफ पुळी करतो.

**–पुट**–पु., शारीर० नासिकापुटकः तत्प्रमाणम्–अङ्गुलस्य त्रिभागेन सहाङ्गुलं त्रिभागाङ्गुलम् तावन्मात्रतिर्यङ्ङित एको नासापुटः ( ड ) संख्यया द्वौ ( सुसू. ३५.१२; असंशा. ८.३० ) नाकपुडी. तिरकी मोजली तर एक पूर्णांक एक तृतीयांश अंगुळी इतकी एक नाकपुडी असावी.

**–पुटभाग**–पु., प्रत्यङ्ग० द्वयोर्नासापुटयोर्बहिर्भागः प्रमाणतोऽयं प्रत्येकमङ्गुलद्वयमितः (सुसू. ३५.१२) दोन्ही नाकपुड्यांचा बाहेरचा भाग. प्रत्येक दोन अंगुळे असावा,

**–प्रतीनाह**–पु., नासारोग० वातेन नासा प्रतिनह्यते बध्यते इव । तल्लक्षणम्–उदानो वायुः कफावृतो भूत्वा स्वमार्गे विगुणः स्थितः स्यात् तदा नासा प्रतिनह्यते बध्यते इव वातेन, सच नासाप्रतीनाहो भवति ( सुउ. २२.१५-१६ ) नाकाचा रोग. वाताने होतो. उदान वायु कफाने आवृत होऊन प्रकुपित होतो व नाक चोंदले जाते. त्याला नासाप्रतीनाह म्हणतात.

**–रोग**–पु., नासागतो व्याधिः, तत्संख्या–एकत्रिंशन्नासारोगाः। ते इमे–अपीनसः पूतिनस्यं नासापाकः शोणितपित्तं पूयशोणितं क्षवथुर्भ्रंशथुर्दीप्तो नासानाहः परिस्रवो नासाशोषश्चत्वारि नासार्शांसि नासाशोफाश्चत्वारो नासार्बुदानि सप्त प्रतिश्यायाश्च पञ्च । एवमेकत्रिंशन्नासारोगाः ( चचि. २६.११०-११६; सुउ. २२.३-५.२०; असंउ. २३; र. २४.२० ) नाकाचे रोग. ते एकतीस असून त्यांची नावे वर दिलेली आहेत.

**–वंश**–पु., शारीर० नासास्थिदण्डः ( सुसू. ३२.४; असंशा. ८.३२ ) नाकाचा दांडा.

**-वदनावरोध**-पु., उपक्रम० नासावदनयोर्निरोधनम् **तेनान्तःप्रविष्टो वायुः रुद्धस्रोतोविवरणं कृत्वा मूर्छामपहन्ति** ( सुउ. ४६.१८ )
नाक व तोंड दाबणे. एक उपचार. नाक व तोंड दाबल्याने आत दाबला गेलेला वायु मूर्च्छा करणाऱ्या दोषांनी बंद केलेली स्रोतसे मोकळी करून मूर्च्छा नाहीशी करतो.

**-शोष**-पु., नासारोग० तल्लक्षणम्-- **क्रुद्धोऽनिलो मूर्ध्नि कफं संशोष्य नासाशृङ्गाटकघ्राणविशोषणं च करोति** ( चचि. २६.१११; सुउ. २३.११ ) **तथा शूकपूर्णाभनासात्वं कृच्छ्रादुच्छ्वसनं च भवति** ( असंउ. २३ )
नाक सुकणे. लक्षणे—प्रकुपित वायु डोक्यातला कफ सुकवून नाक व कान तोंड घसा यांच्या मार्गांचा संधि सुकवितो. आत कुसळे भरली आहेत अशी वेदना होते व कष्टाने श्वास घेतो.

**-श्वयथु**-पु., नासारोग० तल्लक्षणम्—**वातादयो दोषा घ्राणाश्रिताऽसृक्प्रभृतीन् प्रदूष्य नासायाः श्वयथुं कुर्वन्ति** ( चचि.२६.११५ )
नाकाची सूज. वातादि दोष नाकातील रक्तमांस इत्यादी धातूंना दूषित करून नाकात सूज करतात.

**-संवेदन**-पु., वनस्पति०**काण्डीरः** ( ध. ४.६२ )
कांडवेल.

**-सन्नत्व**-(परिव.) न., **नासाया अन्तःप्रविष्टत्वम्**, ( सुचि. ३.४३ )
नाक आत जाणे, नाक बसणे.

**-स्राव**-पु., नासारोग० **नासापरिस्रावः** (चसि.२.२१; सुउ. २३.१० ) नाक गळणे.

**-स्रोतस्**-न., शारीर० **नासारन्ध्रम्** ( ड. सुचि. ४०.६३; असंसू. २९.१४ )
नाक स्रोतस. नाकाचे भोक. पोकळी. नळी.

**-स्रोतोभव**-वि., **नासास्रोतसि जातः ( रोगादिः )** ( सुउ. २२.२० )
नाकाच्या पोकळीत होणारा. रोग इ०

**-हुण्डन**-न., **घ्राणनाशः** ( चक्र. चचि.२८.२२ )
नाकाला वास न येणे.

**नासाग्र**-न., शारीर० **नासान्त्यभागः** (असंसू. २९.१४)
नाकाचे अग्र नाकाची बोंडी, टोक.

**नासाग्रपाक**-पु., लक्षण० **नासाग्रस्य पाकः** ( चचि. २६.१०६ ) नाकाची बोंडी पिकणे.

**नासाध्मान**-न., लक्षण० **कफावृतत्वाद्वायुना नासिकापूरणम्** ( सुउ. ६.१७ )
कफाने वायूचा मार्ग बंद केल्यामुळे नाक भरल्यासारखे वाटते, दाटल्यासारखे वाटते.

**नासानाह**--पु., **नासाप्रतीनाहः** ( सुउ. २३.९ )
उदानवायु कफाने आवृत होऊन आपल्या स्थानातून नाकाकडे जातो. तेव्हा हा नासानाह किंवा नासाप्रतिनाहरोग होतो.

**नासार्बुद**-पु., न., नासारोग० **नासाभवोऽर्बुदसदृशो व्याधिः अर्बुदं नाम स्रोतःपथे विपुलं कोषवच्च यत् तत्। सच मांसास्रदोषाद्भवति। असौ सप्तविधः। पृथग्दोषजस्त्रिविधः, द्वन्द्वजस्त्रिविधः सन्निपातजश्चैकः** (चचि. २६.११६; सुउ. २२.१६-२० असंउ. २३ )
नाकाचा अर्बुद-नाकाच्या पोकळीत आवाळू होणे. ते मांस रक्त दोषांमुळे होते-सात प्रकार, एकेका दोषांचे तीन. दोनदोन दोषांचे तीन व सर्वदोषांचा एक.

**नासार्शस्**—न., नासारोग० **नासायां जायमानो मांसाङ्कुरः, स पृथग्दोषात् सन्निपाताच्च चतुर्विधः** ( सुउ. २२.१८; असंउ. २३ )
नाकातली मूळव्याध. नाकात मांसाचा अंकुर कोंब वाढणे. तो चार प्रकारचा. एकेक दोषाचा असे तीन व त्रिदोषाचा एक असे चार.

**नासावभङ्ग**--पु., लक्षण० **नासास्रोतोवैगुण्यम्, तच्चानुनासिकवाक्यत्वेन ज्ञेयम्** ( ड. सुक. ३.४१ )
नाक भंगणे-नाकाच्या पोकळीत वैगुण्य निर्माण होणे, ते गेंगाणे.-नाकात बोलाण्याने समजावे.

**नासिका**—स्त्री., **पञ्चेन्द्रियाधिष्ठानेष्वेका, घ्राणम्** ( चशा. ७.७ ) **प्रमाणत इयं चतुरङ्गुला** ( चवि. ८.११७ ) **सा शिरसो द्वारम्, तत्र निषिक्तमौषधं स्रोतःशृङ्गाटकं प्राप्य मूर्धानं नेत्रश्रोत्रकण्ठादिशिरामुखानि च व्याप्योर्ध्वजत्रुगतान् दोषानपकर्षति** ( चसि. ९.८८; अहृसू. २०.१ ) **इयं उदानस्य विचरणस्थानम्, उरःस्थानमुदानस्य नासानाभिगलांश्चरेत्** ( अहृसू. १२.५ )
नाक. पाच इंद्रियांच्या अधिष्ठानांपैकी एक-प्रमाण चार अंगुळे. ते डोक्याचे द्वार त्यात टाकलेले औषध शृंगाटक स्रोतसात येऊन डोक्यात व डोळे कान घसा इत्यादी ठिकाणच्या शिरांच्या तोंडात पसरून व्यापून

मानेच्या वरच्या दोषांना खेचून बाहेर काढते. हे उदान वायूचे संचार स्थान. उदानाचे स्थान उर. येथून तो वायु नाक ते नाभीपर्यंत संचार करतो.

**-गण्डकूटललाटास्थि**—न., शारीर० अस्थि० **नासिकागण्डकूटललाटानामस्थि । तत्त्वेकमेकमूलत्वान्नासादीनाम्** ( चशा. ७.६ )
नाक गाल व कपाळ यांचा अस्थि. ते एकच आहे. कारण नाक गाल इत्यादीचे मूळ एकच आहे.

**-पाक**—पु., नासारोग० **तल्लक्षणम्-घ्राणस्थितं पित्तं नासायां व्रणान् करोति तीव्रतरः पाकश्च भवति नासायामार्द्रत्वं पूतित्वं च दृश्यते** ( सुउ. २२.९)
नाक पिकणे. नाकातील पित्त नाकातले व्रण करते व तीव्र असा पाक होतो. नाक ओले व कुजलेले दिसते.

**-मुख**—न., प्रत्यङ्ग० **नासाद्वारम्** ( सुशा. १०.२५ )
नाकाचे दार. नाकाचे तोंड.

**-वंश**—पु., **नासानलिका** (चइं. ८.१०) नाकाची नळी.

**-शोष**—पु., रोग० **नासाशोषः** ( असंउ. २३ )
नाक सुकणे.

**नास्तिक**वि—., **परलोकादिर्नेति मन्यमानः, नास्ति परलोकादि इति मतिर्यस्य, सः** ( चसू. २५.४० )
नास्तिक, परलोक इत्यादि न मानणारा.

**नास्तिक्य**—न., तामसगुण० **आस्तिक्याभावः। धर्ममोक्षपरलोकादिकं नास्तीति बुध्द्याचरतीति नास्तिकः, तस्य भावो नास्तिक्यम्** ( सुशा. १.१८ )
तामस गुण. आस्तिकता नसणे. धर्म मोक्ष परलोक इत्यादी नाही असे बुध्दीने मानतो व तसे वागतो तो नास्तिक. त्याचा भाव नास्तिक्य.

**-बुद्धि**—स्त्री., **नास्त्येव परलोक इति विपर्ययज्ञानम्** ( चसू. ११.७ )
धर्मादी नाहीच असे ज्ञान. अशी बुध्दि.

**नाह**—पु., **परिणाहः** ( अहसू. २५.१७ ) घेर.
न., **उपक्रम० बन्धनम् "सैरण्डपत्रया शोफं नाहयेदुष्णया तया"** ( सुचि. १.२६ )
उपचार. बांधणे. सुजेवर एरंड पत्राने औषधी पोटिस इत्यादी गरम गरम बांधणे.

**निःशल्य**—वि., **शल्यरहितम्, तल्लक्षणम्—प्रसन्ने व्रणे नातिस्पर्शासहिष्णुपु प्रान्तेषु शोफे तापे चाल्पे सति निःशल्यं ज्ञेयम्** (असंसू. ३७.३९ )
शल्य नसलेला व्रण-ओळख-जखम प्रसन्न-स्वच्छ असणे, स्पर्श सहन न होणे हे लक्षण थोड्या प्रमाणात असणे, सूज थोडी व उष्णताही कमी असणे.

( **निःशल्या** )-स्त्री., **वनस्पति०दन्ती** ( रा.६.३३८ )
दाती.

**निःशूक**—पु., **वनस्पति० शालिभेदः मुण्डशालिः** (रा. १६.८९). द्र० 'शालि'
साळीचा प्रकार. मुण्ड साळ.
व्रीहिः (रा. १६.८० ) तांदुळाचा एक वर्ग.

**निःशेषविषनाशिनी**—स्त्री., **वनस्पति०बलामोटा** ( ध. परि. ४.३ )
बारिक मुळांची हिरवी वनस्पती.

**निःश्रेणी**—स्त्री., **वनस्पति० खर्जूरी** ( ध. ५.५३ )
खजूरी.

**निःश्रेयस**—न., **मोक्षः** (चसू. ११.२७) मोक्ष.

**निःश्लेष्मपित्त**—वि.,लक्षण० **निर्गते श्लेष्मपित्ते यस्मात् श्लेष्मपित्तरहितः, अतिविरिक्तस्य एकलक्षणम्.** (चसू. १६.१० )
कफ व पित्त ज्याच्या शरीरातून निघाले आहेत असा. कफपित्तरहित. अतिरेच झाल्याचे लक्षण.

**निःश्वास**—पु., **श्वासप्रवेशः** ( हे. चसू. १८.४९ )
श्वास, प्रवेश, श्वास घेणे.
**फूत्कारः** ( ड. सुक. ३.४ ) फूत्कार.

**-विष**—वि., **निःश्वासे फूत्कारे विषं यस्य दिव्यः सर्पो निःश्वासविषो भवति** ( सुक. ३.५ )
ज्याच्या फूत्कारात विष असते तो दिव्यसर्प. निश्वासविषी सर्प.

**निःसङ्ग**—वि., **निर्गतोऽभिघातहेतोः सङ्गः सम्बन्धो यस्य स व्रणः** ( सुचि. १.१११ )
ज्याचा आघाताच्या कारणाचा संबंध नाहीसा झाला आहे असा ( व्रण )

**निःसंज्ञत्व**—न., **लक्षण० चेतनारहितत्वम्** ( ड. सुउ. ५१.१२ )
संज्ञा नसणे, चेतना नसणे.

**निःसंपात**—वि., **उल्लोचसहितं देशादि** (सुसू. ४६.४५८ )
छत असलेली जागा. छतामुळे माती, केर, कचरा धूळ अन्नात पडण्याची भीति नसते.

**निःसंशय**—वि., **संशयरहितम्** ( सुशा. ५.४७ )
संशयरहित.

**निःसार**—वि., **लक्षण० अपगतधातुसारः** ( चचि. १६.६ )
धातूचे सार नाहीसे झाले आहे असा ( पांडुरोगी )
**निर्गतसारमाहारादि** ( सुसू. ४६.५२७ )

**निर्वलीक**–लक्षण० वलीरहितम् ( चसि. ३.१६, अहृसू. २९.२९ ) वळी नसलेला.

**निर्वातशयनस्थित**–वि., वातरहिते देशे शय्योपरि वर्तमानः ( असंसू. २५.३७ )
निवात शय्येवर असलेला. निवाऱ्याच्या अंथरुणावर असलेला.

**निर्वाप**–पु., तप्तलोहस्य जले प्रक्षेपणम् ( र. ८.५६ )
तापलेला धातु पाण्यात बुडवणे.

**निर्वापन**–न., उपक्रम० व्रणस्य षष्टयुक्रमेष्वेकः, सेकलेपादिभिर्वेदनोपशमः ( सुचि. १.८ )
उपचार. व्रणाच्या ६० उपचारांपैकी एक लेप. शिंपडणे इत्यादिकानी वेदना शमविणे.
**दाहौष्ण्यशमनम्** ( चचि. २५.४० )
आग व उष्मा शमणे.
**रोपणम्** ( चसू. ३.२६ ) व्रण रुझवणारे.
**दाहप्रशमनम्** ( चसू. १३.१४ ) दाहशामक.
**औषधस्य शीतजलस्य वा परिषेकः** ( चसू. १८.५)
औषधाचे किंवा थंड पाण्याचे शिंपण, शिंपणे, शिंपडणे.
**निर्वाहणम्, साध्ये द्रुते लोहे वङ्कनालेनान्यलोहप्रक्षेपणम्, एकीकरणम्** ( र. ८.२४ )
जो धातु आपणाला विशिष्ट प्रकारचा हवा आहे तो पातळ करून त्यात वंकनालाने दुसरा धातू घालणे, एकीकरण.
( जले ) **निःक्षेपणम्** ( सुसू. ४५.१२ )
पाण्यात घालणे,

**निर्वाहण**–न., लक्षण० प्रवाहणम् ( चचि. १४.९ )
कुंथणे.
**निर्वापणम्, एकीकरणम्** ( र. ८.२४ )
एक करणे, दोन धातूंचे एकीकरण.

**निर्वाहिका**–स्त्री., रोग० प्रवाहिका ( काखिल ४.८१ )
आव. रक्ताची हगवण.

**निर्विकार**–वि., निर्व्यापारः ( सुचि. ७.३१ )
हालचाल न करणारा.
**नीरोगः** ( चसू. १.५६ ) रोग नसलेला निरोगी.

**निर्विष**–वि., विषरहितः निर्विषाः सर्पा गलगोलीशूकपत्राद्यः ( सुक. ४.३४. ( ४ ) निर्विष सर्प.
**गोनसादिः** ( ड. सुउ. ६२.१७ ) घोणस इत्यादी
**ईषद्विषः** ( ड. सुक. ४.१०० ) थोडे विष असलेला.
न., सर्पदंश० अविषं तत् ( सुक. ४.१४ )
एक प्रकारचा सर्पदंश. निर्विषदंश.

**निर्वृत**–वि., अपेतदुःखानुबन्धि ( अहृसू. २३.२८ )
दुःखाचा संबंध नाहीसा झालेला. दुःख नाहीसे झालेला.

**निर्वृति**–स्त्री., **सुखम्** ( चसू. २१.२९ ) सुख.
**शान्तिः** ( सुसू. ४१.७ ) **सा च पुष्टिकराणां श्रेष्ठा** (असंसू. १३ ) शांति. पुष्टिकर उपचारात श्रेष्ठ.

**निर्वृत्त**–वि., जातमात्रम् ( सुसू. ४३.३ )
जन्मतःच, जन्मल्यावरोबर.

**निर्वृत्ति**–स्त्री., **निष्पत्तिः** ( सुशा. ३.३६ )
उत्पत्ति. निर्मीति.
**अभिव्यक्तिः** ( चसू. १.६४ )
प्रकट होणे, व्यक्त होणे, निर्मिती.

**निर्वेग**–वि., **निश्चलम्** ( ड. सुसू. ४५.४० )
निश्चल. वेगरहित, न हालणारे.

**निर्वेद**–पु., आत्मन्यवज्ञा, आत्मलाघवकल्पना ( चइ. १२.८७ ) आपण लहान आहोत असे समजणे, आपले वैगुण्य पाहणे.

**निर्वेधिम**-पु., **पञ्चदशकर्णबन्धेष्वेकः पीठोपमपालिरुभयतः क्षीणपुत्रिकाश्रितः कर्णबन्धः** (सुसू. १६.१०)
दोन्ही पाळ्या नष्ट झालेल्या कानाला त्याचे बाहेरील गोळीसारख्या भागावर वेध घेऊन केलेला बंध.

**निर्व्यलीक**–वि., **त्वक्सङ्कोचरहितम्** ( सुचि. ७.३० )
वळ्यारहित कातडी.

**निर्व्यूढ**–वि., **धातूनां द्रावणेनैकीकृतम्, धमनद्वारा अन्तःप्रवेशेन ऐक्यमापन्नम्** ( र. २१.१९४ )
निरनिराळे धातू पातळ करून एकत्र केलेला धातू. दोन धातू एकत्र फुंकून एकत्र करणे.

**निर्हरण**–न., **उपक्रम० हरणम् दोषादीनाम्** ( ड. सुउ. ३९.१२४ )
उपचार. दोष इत्यादी बाहेर काढणे, शोधन देणे.

**निर्हार**–पु,, **मलादिनिर्गमः** ( चक्र. चसि., ११.३० )
मळ इत्यादी बाहेर जाणे.

**निर्हृतशल्या**–वि., **अपहृतशल्या** ( सुचि. १५.१९ )
सल – शल्य बाहेर काढलेली.

**निलयन**–न., **उपवेशनम्** ( सुसू. ३२.४ )
बसणे ( डोक्यावर कावळा इ० बसणे )
(परिव०) **श्लेषणम्** ( सुचि. ३३.४० )
चिकटणे, लागणे.

**निवात**-वि., वायुरहितं स्थानादि ( सुचि.२४.८५ )
वारा नसलेले ठिकाण इत्यादी.
न., एकान्तस्थलम् ( चचि. ९.७८ )
निवांत जागा – स्थान. एकांत स्थान
पु., स्वेद० निरग्निकः ( सुचि. ३२.१५ ) द्र० 'स्वेद'
अग्निशिवाय घाम काढण्याचा एक उपाय.
**-शरण**-न., निर्वातगृहम् ( असंसू. २६.९ )
निर्वात घर, निवाऱ्याचे घर,
**निवारण**-न., चिकित्सा ( सुउ. ४७.२४ ) उपचार.
**निवासवृक्ष**-पु., आवसतरुः ( चशा.५.१० ) एक झाड.
**निवृत्त**-न., गुह्यरोग० परिवर्तिका ( असंउ. ३८ )
गुह्यभागाचा रोग. मण्याच्या खाली कातडी सुजून खाली लोंबते, गाठीयुक्त असते इत्यादी लक्षणांचा शिश्नाचा विकार.
निर्गतं, परिवृत्तम् ( असंउ. ३८ ) वाटोळे झालेले.
**-चर्मन्**-न., क्षुद्ररोग० परिवर्तिका ( सुनि. १३.४८ )
शिश्नावरचे सुजलेले चामडे उलटलेले असणे.
**-प्रसवा**-स्त्री., यस्या अनुजननकालः षड्भ्यो वर्षेभ्य ऊर्ध्वं, सा ( सुशा. १०.६६ )
जिची प्रसूती सहा वर्षांपेक्षा अधिककाळाने झाली अशी स्त्री.
**-सन्ताप**-वि., शारीरमानसदुखःरहितः, व्याधिमुक्तः ( सुचि. ३०.३ )
शरीर व मन यांचे दुःखरहित. रोगमुक्त.
**-सन्तापीय**-वि., अध्याय० निवृत्तसन्तापेतिशब्दमधिकृत्य कृतः ( सुचि. ३० )
अध्यायाचे नाव. यात शारीर व मानसिक रोग नाहीसे करण्याच्या दृष्टीने सांगितलेले रसायनोपचार आहेत.
**निवृत्ति**-स्त्री., परावृत्तिः सा च सुखमिति जेगीयते (चशा. ५.८) निवृत्ति, परावृत्ति, सुख, निवृत्त होणे.
वैराग्यम्, निवृत्तिः पुष्टिकराणां श्रेष्ठा ( चसू. २५.४० )
वैराग्य. वैराग्य हे पुष्टि करणाऱ्या सर्व उपचारात श्रेष्ठ.
उपरमः ( चइ. ११.७ )
शेवट, मरण. थांबणे. विश्रांति.
**-काल**-पु., निर्गमनसमयः ( अहसू. १९.२० )
जाण्याचा समय, जाण्याची वेळ.
**-लक्षण**-न., निवृत्त्यनुगुणं लक्षणम् ( चवि. ८.८० )
जाण्याचे लक्षण.

**निवेश**-पु., स्थापनम्, आश्रयणम् ( असंसू. ८.६ )
स्थापन करणे, आश्रय करणे.
**निवेशन**-न., गृहम् ( असंसू. ८.७ ) घर.
**निशा**-स्त्री., रात्रिः ( सुसू. ५.२७ ) रात्र.
वनस्पति० दारुहरिद्रा ( ६.८४ ) दारुहळद.
हरिद्रा ( सुचि. १७.२१; ध. १.५४; र. ११.१०५ ) हळद.
**-कल्कयुक्ताम्भस्**-( परिव०) न., हरिद्राकल्कयुक्तं जलं यच्च जलौकास्थापनार्थमुपयुज्यते जलौकोपक्रमे ( अहसू. २६.४० )
हळद घातलेले पाणी. जळवा ठेवण्याला उपयुक्त.
**-चर**-पु., पिशाचः, राक्षसः ( सुसू. ५.२२ )
पिशाच्च, राक्षस.
देवादिग्रहः निशाविहारित्वात् असृगादिभोजित्वाच्च राक्षसादय इत्येके ( सुउ. ६०.६ )
देव इत्यादी ग्रह रात्री संचार करतात म्हणून व रक्तमांस खातात म्हणून त्यांना राक्षसादि ग्रह असेही म्हणतात.
वनस्पति० चोरकः ( रा. १२.१२७ ) चोरओवा.
**-च्छद**-पु., वनस्पति० शटी ( ड. सुचि. ३८.४३ )
द्र० 'सठी' 'शठी' कचोरा.
**-द्वय**-न., हरिद्रा दारुहरिद्रा च ( अहसू. १५.४० )
हळद व दारुहळद.
**-पर्युषित**-वि., निशागमं यावत्स्थापितत्वात् शीतकषायः ( चक्रः चचि. २१.५८ )
थंड काढा, रात्रभर ठेवलेला, शिळा काढा.
**-वन**-पु., वनस्पति० शणः (रा. परि. ४.१७) सण.
**निशाटक**-पु., निर्यास० गुग्गुलः (रा. १२.१८३) गुग्गूळ.
**निशान**-न., शस्त्रधाराकरणम् [ सुसू. ८.१३ ]
शस्त्राला धार लावणे.
**( निशानि )**-स्त्री., अनिशितधाराणां शस्त्राणां निशानार्थं माषयूषप्रभा श्लक्ष्णशिला ( असंसू. ३४.३७ )
बोथट धारेच्या शस्त्रांना धार लावण्याकरिता उडदाच्या कढणाच्या रंगाचा गुळगुळीत दगड.
**निशान्धता**-स्त्री., नेत्ररोग० नक्तान्ध्यम् ( र. २९.१३८ )
रातांधळे. रात्री न दिसणे.
**निशान्धा**-स्त्री., वनस्पति० जन्तुका ( रा. ३.१२७ )
काळी बारीक, गाठाळ व पुष्कळ पानांची खाजकुहिलीच्या फळासारखी पण वाकड्या फळाची वनस्पती. माळव्यात जंतुकारी; हिंदीत पापडी लाख म्हणतात.

**निशित**–न., खनिज० लोहभेदः तीक्ष्णलोहम् ( र. १३.३० ) लोखंडाचा प्रकार. पोलाद.
 **–निस्त्रिंश**–पु., तीक्ष्णखड्ग ( सुक. ४.३६ ) तीक्ष्ण तलवार.

**निशिस्थित**–वि., शीतकषायः ( चचि. ३.२०७ ) रात्रीं ठेवलेला थंड काढा. शिळा काढा.

**निशीथ**–पु., अर्धरात्रम् ( असंउ. ६. ) अर्धी रात्र.

**निश्चन्द्र**–वि., चन्द्रिकया निर्मुक्तम् ( र. २.४५ ) चंद्र नसलेली रात्र, काळोखी रात्र.

**निश्चंन्द्रिक**–वि., लक्षण० चन्द्रिकारहितम् ( र. २.१४ ) चंद्रिका नसलेले, चमक नसलेले ( भस्म )

**निश्चयात्मिका**–वि., वस्तुस्वरूपपरिच्छेदात्मिका बुध्द्यादिः ( चसू. ८.१२ ) वस्तूचे इतरांपेक्षा भिन्न असलेल्या स्वरूपाचे ज्ञान झालेली बुद्धि.

**निश्चला**–स्त्री., वनस्पति० शालिपर्णी ( रा. ४.११४ ) सालवण.

**निश्चारक**–पु., रोग० अतीसारस्यावस्थिको भेदः। प्रवाहिकाया अवस्थाभेदोऽपरपर्यायश्च, पुरीषक्षयापरपर्यायः ( ड. सुउ. ४०.१४५ ) अतीसाराच्या अवस्थांचा एक प्रकार, आव रक्ताचा प्रकार, पुरीषक्षय. मळक्षय हे याला दुसरे नाव.

**निश्चेष्टाधरकाय**–वि., लक्षण० चलनवलनादिश्चेष्टा, तद्रहितोऽधरकायो यस्य सः ( का. फक्कचि. ) खालचे शरीर निश्चेष्ट होणे. खालच्या शरिराचे चलनवलन बंद होणे.

**निश्च्युतित**–वि., परिस्रावितम् ( सुचि. ६.१८ ) परिस्रावित, गाळलेले ( तेल ).

**निःश्रेणिका**–स्त्री., वनस्पति० गुणाः– नीरसोष्णा पशूनामबलप्रदा ( रापरि. ८.५० ) वनस्पती, **गुण**–रस कमी असणारी. पशूंचे बल कमी करणारी.

**निःश्वसित**–न., श्वासप्रवेशन ( सुशा. २.५५ ) श्वास घेणे. श्वास आत प्रविष्ट करणे.

**निश्वास**–पु., श्वासस्याशरीरान्तःप्रवेशनम् (अरु.) श्वासवेशः ( हे. अहृसू. ११.१ ) श्वास शरिरात घेणे. श्वासनिर्गमः ( सुनि. ५.३३ ) श्वास शारिरातून बाहेर टाकणे.

**निषण्ण**–वि., उपविष्टम् ( सुचि. ३७.१०९ ) बसलेले.

**निषिक्त**–वि., निक्षिप्तम् अवसिक्तम् ( सुचि. ६.१३ ) ठेवलेले.

**निषूदन**–वि., विनाशकः ( अहृसू. १५.३१ ) नाशक.

**निषेक**–पु., क्षरणम्, रोपणम् ( असंसू. ९.७१ ) शिंपडणे. लावणे ( बी ), झरणे.
 **–सात्म्य**–न., जन्मसात्म्यम्, निषेको योनौ शुक्रस्थापनं, लक्षणया निषेको जन्म, कारणे कार्योपचारात्। ( कासू. २३.३० ) जन्मापासून आत्मसात असलेले.

**निषेकाभिमुख**-वि., क्षरणाभिमुखम् ( असंसू. ९.७१ ) स्राव होण्याच्या बेतात असलेला. पुढच्या क्षणी होण्याची तयारी असलेला.

**निष्क**–पु., मान० शाणः, धरणद्वयं, माषचतुष्टयं तोलकपादश्च ( र. ११.३ ), चार मासे. एक चतुर्थांश तोळा.
 न., खनिज० सुवर्णम् ( रा. १३.३ ) सोने.

**निष्कुट**–पु., गृहोपवनम्, (ड.) वनगहनम् (सुउ. ३०.८) घराजवळील बाग.
 गृहारामः ( इन्दु. असंउ. ५— ) घराजवळचा क्रीडेचा बगीचा. क्रीडेची जागा.

( **निष्कुटी** )–स्त्री., वनस्पति० एलाभेदः सूक्ष्मैला ( ध. २: ४४ ) द्र० 'एला' वेलदोडा. लहान वेलची.

**निष्कुल**–वि., निरस्थि, निर्बीजम् ( चचिं. १.६६ ). आठळी नसलेला. निर्बीज, फळांतील हाड नसलेला भाग.

**निष्कुलीकरण**–न., निष्फलीकरणम् निर्बीजीकरणम् ( सुचि. २७.९ ) आठळी काढणे, बी काढणे.

**निष्कोषण**–न., दन्तरञ्जकैः पुरुषैर्दन्तनिशानार्थमुपयुज्यमानः सविषः शाणो दन्तकाष्ठं वा ( सुसू. २३.८ ) दांत कोरणे, सविष धार लावण्याचा दगड किंवा दात घासण्याची काडी. दात रंगविणारे यांचा उपयोग करतात.

**निष्क्रमण**–न., बहिःक्षेपणम् ( अहृसू.१२.९ ) बाहेर काढणे. बाहेर फेकणे.

**निष्क्रियत्व**–न., चिकित्साकरणे निर्वर्तनीयत्वम् ( चचि. २५.३४ ) उपचार न करणे. असाध्यत्व.

**निष्काथ**–पु., क्वाथः रसकापरपर्यायः ( सुशा. १०.१६; र. २२.२० ) काढा. कलखापरी.
 कल्प० चतुर्भागावशेषः क्वाथः ( सुचि. ३१.६ ) चतुर्थांश–चवथा हिस्सा उरवलेला काढा.

**निष्टनन**–(परिव०) न., दुःखोद्गारः प्रवाहणम् कुन्थनम् (कासू. २५.२६)
दुःखाचे उद्गार. कुंथणे, कण्हणे.

**निष्ठा**–स्त्री., मोक्षः (चशा. ५.२६)
मोक्ष–दुःखाचा अत्यंत नाश.

**निष्ठीव**–पु., मुखस्थितलालात्यागः (अहसू. १३.२४)
थुंकी थुंकणे, तोंडात साठलेली थुंकी टाकणे. लाळ टाकणे.

**निष्ठीवन**–न., (परिव०) निष्ठीवः (सुचि. ४०.३०)
थुंकणे.

**निष्ठीविका**–स्त्री., निष्ठीवनम् (चसू. ८.२१) थुंकणे.

**निष्ठुर**–पु., खनिज० (कृत्रिमधातुः) पित्तलम् (ध. ६.१९) पितळ.

**निष्ठ्यूत**–न., ष्ठीवितः उद्वान्तः श्लेष्मा (चइ. ९.१८)
थुंकी, थुंकलेला ओकलेला कफ.

**निष्ठ्यूति**–(असंचि. ५.२४) थुंकणे, थुंकी.

**निष्पतद्यन्त्रसलिल**–न., यन्त्रपतितं जलम् (असंसू. ४.३८) यंत्रातून पडणारे पाणी.

**निष्पतन**–न., स्रावः (चचि. २६.११९) स्राव.

**निष्पत्रक**–पु., वनस्पति० करीरः (रा. ८.१६.) नेपती.

**निष्परीहार**–वि., निर्यन्त्रणः (सुसू. ४४.८८)
निर्यंत्रण नसलेले.
अनियत्रणः (अहसू. १९.९६९) नियंत्रण नसलेला.

**निष्पाव**–पु., विदलधान्य० शिम्बीधान्यम्, वल्लो वातपित्तलोऽसौ (चसू. २७.३३) अस्य पयसा सहाभ्यवहरणं विरुद्धम् (चसू.२६.८४) गुणाः– उष्णो गुरुर्मूत्रस्तन्यकरः, सरो विदाही, शुक्रनाशनः शोषशोफकृद्वातघ्नो रक्तपित्तघ्नश्च (ध. ६.११०) मधुरः कषायो रूक्षोऽम्लपाकी वातविबन्धकृद्विषश्लेष्मशोथहृच्च (भाप्र.) कटुनिष्पावो निष्पावभेदः, तद्गुणाः–तिक्तः कटुकः कषायो गुरू रूक्षो वातलोऽस्रप्रदः कफदो त्रिदोषनुच्च (रा. १६.१७६.७७)
हिं.—निष्पाव, भटवांसू.
**म.—पावटा.**
गु.—ओलिया वाल.
बं.—भेटरासू सीम.
ता.—वेळवरै.
वाल, पावटा. शेंगातील डाळवर्गीय धान्य. **गुण**–गोड तुरट रूक्ष जड उष्ण पचनानंतर आंबट, सारक, लघ्वी अधिक करणारा, दूध वाढविणारा, शुक्रनाशक, वातघ्न, रक्तपित्तनाशक, सूज व शोष करणारा. **दुसरा**–गोड तुरट रूक्ष पचनाने आंबट वात व अवरोध करणारा विष सूज कफनाश करणारा, **कडुपावटा**–कडु तिखट तुरटजड कफकर वातूळ रक्तवर्धक विषदोष जिंकणारा.
**श्वेतशिम्बी** (चनि. २.४) पांढऱ्या शेंगेचा पावटा.
**शाक०** फञ्जीचिल्ल्यादिगणोक्तः अयं मधुरो गुरू रूक्षः शीतवीर्यो विष्टभ्य जरणशीलः पुरीषभेदी च (चसू. २७.१००).
वालाची भाजी, फंजीचिल्ल्यादि–गणातली. ही गोड जड रूक्ष थंड पोटात वात धरून पचन होणारी मळ फोडणारी.
**मान०** द्विगुञ्जः (र. ११.२) वजन, दोन गुंजा.
**धरणस्य एकोनविंशतितमो भागः** (सुचि.३१.७).
धरणाचा एकोणविसावा भाग.

**(निष्पावि)**–स्त्री., वनस्पति० हरिच्छुभ्रभेदादियं द्विविधा, निष्पावीगुणाः—कषायमधुरा सरा मेध्य-दीपनी रुचिकरी कण्ठशुद्धिकरी च। निष्पावीद्वयं समानगुणम्। तत्र शुभ्रा सङ्ग्राहि समवीर्या ईषच्छ्रेष्ठा वर्तते (रा. परि. ७.९९)
पावटाप्रकार, आबई, यात दोन प्रकार. हिरवी व पांढरी. **हिरवी** तुरट गोड अग्निदीपक सारक बुद्धि धारणाशक्तिवर्धक रुचकर कंठ शुद्ध करणारी.
**पांढरी** थोडी श्रेष्ठ. मळाचा संग्रह करणारी.

**निष्पावाम्बु**–न., निष्पावोदकम्, निष्पावक्वाथः आमाशयगते विषे वमनायोपयोगि (असंसू. ८.३८)
पावट्याचे कढण–पाणी आमाशयातले विष वांतीने काढण्यास उपयोगी.

**निष्पीडितरस**–वि., निर्गतरसम् (अहसू. ६.९३)
ज्याचा रस पिळून काढला आहे. रस काढलेला, नीरस.

**निष्पीत**–वि., क्षीणम् (चसू. १३.[illegible]) क्षीण.
**–कफ**–वि., लक्षण० क्षीणकफः (चसू. १३.४७)
क्षीण कफाचा, कफक्षीण.
**–मेदस्**–वि., लक्षण० क्षीणमेदाः (चसू. १३.४७)
मेद कमी झालेला. मेदःक्षीण. कृश.

**निष्पुरीष**–वि., लक्षण० क्षीणवर्चाः (ड. सुउ. ४०.१३२)
मळ कमी झालेला. क्षीणमळाचा.

**निष्पेष**–पु., चूर्णनम्, आघातः घर्षणम् (चचि. ३०.१६६)
चूर्ण करणे, वाटणे, घासणे, आघात करणे, खलणे.

**निष्प्रत्यनीक**–वि., **यस्य प्रत्यनीकः प्रतिपक्षी न विद्यते सः** ( चचि. ३.५६ )
ज्याला प्रतिपक्षी नाही असा. ज्याला शत्रु किंवा विरोधी नाही असा.
**निष्क्रियः** ( सुसू. २१.३० )
निष्क्रिय, कार्य न करणारा.

**निष्प्रभत्व**–न., **लक्षण० प्रभाहानिः** ( सुसू. १५.७ )
कांती नष्ट होणे.

**निसर्ग**–पु., **स्वभावः** ( सुउ. ६१.२१ )
स्वभाव. दूषित करण्याचा स्वभाव. प्रकृति दोष दृष्टीने.

**निःसृता**–वि., **अधःस्त्रस्ता** ( चचि. ३०.४४ )
खाली आलेली, बाहेर आलेली. खाली ढळलेली.

**निस्तन्द्र**–वि., **ग्रहग्रस्तलक्षण० तन्द्रारहितः** (सुउ. ६०.८)
ग्रहाने ग्रासलेल्याचे लक्षण. तंद्रारहित, झापड नसलेला.

**निस्तलन**–न., **भर्जनम्** ( अहसू. ७.३७ )
भाजणे, तळणे.

**निस्तुष**–वि., **निर्गततुषम्** ( असंसू. ७.३९ )
निस्तुष. तूस काढलेले, कोंडा, भुसा नसलेले.
पु., **वनस्पति० गोधूमः** ( १६.१५१) गहू.
**–यव**–पु., **तुषरहितो यवः** ( असंसू. ८.९४ )
तूस काढलेला जव. कोंडा - भुसा काढलेला जव.

**निस्तोद**–पु., **वेदना० नियतप्रबन्धप्रवृत्ता रुक्, सैव विच्छिन्ना, शूलमित्युच्यते** ( अहसू. २९.३ )
टोचणी, थोड्या थोड्या नियमित वेळाने येणारी कळ, ठसठस.
**लक्षण० सूचीभिर्व्यधनमिव पीडा** ( सुउ. ३८.११ )
सुईने भोसकल्याप्रमाणे पीडा. टोचणी.

**निस्तोदन**–न., **लक्षण० निस्तोदः सूच्येव व्यधनम्** ( सुउ. ६.६ )
सुई भोसकल्याप्रमाणे पीडा. टोचणी.

**निस्त्रिंश**–पु., **खड्गः** ( सुशा. ४.७२ ) तलवार.
**–पत्रक**–पु., **वनस्पति० स्नुही** ( ध. १.२३५; चक. १०.८ ) त्रिधारी निवडुंग.
**(–पत्रिका)**–स्त्री., **वनस्पति० स्नुही** ( रा. ८.३५५ )
त्रिधारी निवडुंग.
**–शिम्बिका**–स्त्री., **वनस्पति० असिशिम्बी** ( रापरि. ७.९७ )
तलवारीसारखी मोठी जाड शेंग.

**निहित**–वि., **धृतम् स्थापितम्** ( सुचि. ३०. २९-३० )
धरलेलं, ठेवलेले.

**नीच**–पु., **वनस्पति० चोरकः** ( रा. १२.१२७ )
चोरओवा.
वि., **अपकृष्टो म्लेंच्छादिः** ( सुचि. २४.९० )
म्लेंच्छ इत्यादि.
**–नखरोमन्**–वि., **क्लृप्तत्वात् कर्तनप्रसाधननखरः, अल्पं नखरोमादि यस्य सः** ( सुसू. २.६ )
नखे व केश कापलेला. नखे व केश व्यवस्थित कापल्याने थोड्या नखकेसांचा.
**–वज्र**–न., **खनिज० वैक्रान्तम्** (रा. १३.५०) वैक्रांत.

**नीचैःकदम्ब**–पु., **वृक्ष० लघुकदम्बः** ( सुउ. ५१.४० )
लहान कळंब.

**नीप**–पु., **वृक्ष० कदम्बः** ( चक. १.१४; ध. ५.१०४ )
कळंब.
**कदम्बभेदः धाराकदम्बः** ( रा. ९.१७२ )
कळंबाचा प्रकार.
**कदम्बभेदः धूलिकदम्बः** ( ध. ५.१०५ )
**अयं प्रावृषि पुष्पितो भवति** ( सुसू. ६.३२ )
कळंबाचा प्रकार. हा पावसाळ्यात फुलांनी बहरतो.

**नीर**–न., **जलम्** ( ध. ६.३०२ ) पाणी.
**–कणा**–स्त्री., **वनस्पति० जलपिप्पलिका** ( र. ११.५७ )
जलपिंपळी.
**–ज**–न., **वनस्पति० नीलोत्पलम्** ( सुचि. २५.३३ )
निळे कमळ.
**मणि० मौक्तिकम्** ( रा. १३.६६ ) मोती.
पु., **वनस्पति० दर्भः** ( ध. ४.१३३ ) दर्भ.
**–द**–पु., **वनस्पति० मुस्ता** ( रा. ६.५८ ) नागरमोथा.

**नीरसा**–स्त्री., **वनस्पति० निश्रेणिका** ( रापरि. ८.५० )
एक वनस्पती.

**नीरुज**–वि., **नीरोगः** ( र. १.६९ ) निरोगी.
**विगतपीडम्, अखण्डितम्** ( र. १८.२१ )
पीडा शांत झालेला, अखंड.
न., **वनस्पति० कुष्ठम्** ( र. १८.२१ ) कुष्ठ.

**नील**–पु., **वनस्पति० वटः** ( रा. ११.११४ ) वड.
**वनस्पति०, नीलगुणाः– कटुकः कषाय उष्णो लघु-वातामयनानाश्वयथुनाशनश्च** ( रापरि. ९.११ )
एक वृक्ष–तिखट तुरट उष्ण हलका वातरोग निरनिराळ्या प्रकारची सूज नाशक.
**पशु० गवयः** ( धपरि. ६.३५ ) गवा, रानगाय.
न., **नीलाञ्जनम्** ( र. २३.८० ) नीलांजन, सुरमा.
**वनस्पति० तालीसपत्रम्** ( ध. २.५३ )
तालीसपत्र.

**खनिज० तुत्थम्** ( रा. १३.२०५ ) मोरचूद.
**खनिज० अञ्जनम्** ( रा. १३.२१४ ) सुरमा.
**रत्न० एकच्छायं गुरु स्निग्धं स्वच्छं पिण्डितविग्रहं मृदु मध्यलसज्ज्योतिः सप्तधा नीलमुत्तमं मतम्** ( र. ४.५४ ) **नीलगुणाः– दीपनं वृष्यं त्रिदोषघ्नं विषमज्वरदुर्नामश्वासकासघ्नं च** ( र. ४.५६ )
नीळ. ( रत्न ). शनीचा खडा. सर्वत्र एक निळ्या रंगाची छाया असावी. जड स्निग्ध स्वच्छ गोल आकाराचा, मऊ खड्याच्या मध्यभागातून प्रकाश किरण पसरणारा अशा सात गुणांचा नीळ उत्तम. **गुण**–अग्नि-दीपक शुक्रधातूला हितकर त्रिदोष-नाशक. विषमज्वर मूळव्याध श्वास खोकला-नाशक.
वि., **नीलवर्णम् सामावस्थायां पित्तस्य वर्णः** ( सुसू. २१.११ )
निळा, हिरवा रंग. सामावस्थेतील पित्ताचा रंग.

**(नीला)**–स्त्री., **वनस्पति० पिप्पलीभेदः** ( रा. ६.१०४ )
पिंपळीचा प्रकार.
**गिरिकर्णी** ( ३.१२५ ) गोकर्णी.
**वार्ताकिनी** ( रा. ७.१२८ ) रिंगणीचा प्रकार.
**नीलिनी** ( रा. ४.३४९ ) काळादाणा.
**पुनर्नवाभेदः नीलपुनर्नवा** ( रा. ४.५१० ) द्र० ' पुनर्नवा ' निळा पुनर्नवा.
**भैषज्य० लाक्षा** ( रा. ६.१४२ ) लाख.
**ग्रहमातृ०** ( असंउ. ४ ) बालग्रह.
**वनस्पति० नीलक्षीरा नीलपुष्पा लताप्रतानबहुला द्रोणीप्रावेशिकरसायनेपूक्ता औषधिः** ( चचि. १ (४) ७ )
एक महौषधी. डोणीत प्रवेश करणाऱ्याच्या सर्वधातु-परिपोषक विधीत सांगितलेली.
**धमनी०** ( असंशा. ७.२१ )
**गलपार्श्वगतधमनी** ( चक्र. सुशा. ६.२७ )
एक धमनी. गळ्याच्या बाजूची धमनी ( सिरा ).
**ग्रीवापार्श्वस्थितसिरा** ( अरु. सुशा. ६.२७ )
मानेच्या बाजूची शीर.
**मर्म० कण्ठनाडीमुभयतः द्वे नीले द्वयोः पार्श्वयोः सिराममर्णी चतुरङ्गुले वैकल्यकारिणी च** ( सुशा. ६.२७ )
मर्मस्थान. घशाच्या नळीच्या दोन्ही बाजूंस दोन नीला नावाच्या शिरा आहेत त्या. एक मर्म. चार अंगुळे. विकलता आणणारे.
**सिरा० नीलवर्णैषा, पित्तवाहिनी च** ( सुशा. ७.१८ )
शिरांचा एक प्रकार. निळ्या रंगाच्या. पित्तवाहक.

**(नीली)**–स्त्री., **वनस्पति० नीलिनी** ( रा. ४.३४९; र. २९.३४; र. २०.६८ ) काळादाणा.
**कालाञ्जनी** ( इन्दु. असंक. २ ) एक वनस्पती.
**वनस्पति० नीलवृक्षः, नीलापराजिता वस्त्ररञ्जनोपयोगिनी, एतद्रसेन नीलाख्यं रत्नं विशुद्ध्यते** ( र. ४. ६४ )
नीळ, निळी, कपडे रंगवण्यास उपयुक्त. हिच्या रसाने नीलमणी–शनीचा खडा शुद्ध होतो.
**श्रीफलिका** ( सुसू. ४४.२२ ) काळादाणा.
**शारदं फलम् श्रीफलम्** ( ड. सुचि. १९.६८ )
काळादाणा.
**नीलाञ्जनिका** ( सुक. ६.१५ ) काळादाणा.

**–कटुकी**–स्त्री., **वनस्पति० कृष्णवर्णा कटुकी.** ( र. ८.६०.६४ ) काळी कुटकी.

**–कण्ठ**–पु., **पारदयोग० पारदगन्धकलोहशुल्बादि-साधितोऽयं श्वासादिसर्वरोगहरः** ( र. १३.६३ )
पाऱ्याचा योग–पारा गंधक लोहभस्म ताम्र इत्यादींनी सिद्ध. श्वासादि सर्वरोगहर.
न., **वनस्पति० मूलकम्** ( रा. ७.५० ) मुळा.

**–कण्ठाक्ष**–पु., **वनस्पति० रुद्राक्षः** ( रापरि. ११.१५ )
रुद्राक्ष.

**–कन्द**–पु., **वनस्पति० शुभ्रालुः** ( रापरि. ७.३३ )
विषारी पांढरा कंद.
न., **वनस्पति० मूलकम्** ( ध. ४.३३ ) मुळा.

**–कपित्थ**–पु., **वनस्पति० राजाम्रः** ( ध. ५.११ )
उत्कृष्ट आंबा.

**–कपित्थक**–पु., **वनस्पति० राजाम्रभेदः** ( रा. ११.९ )
द्र० ' राजाम्र ' उत्कृष्ट आंब्याचा प्रकार.

**–कमल**–न., **वनस्पति० नीलपद्मम्** ( रा. १०.२३९ )
निळे कमळ.

**–काच**–पु., **नेत्ररोग० पैत्तिकोऽयम् याप्यः** ( सुउ. १०.३२ ) काचबिंदु. पित्तप्रधान नेत्ररोग. औषध व पथ्य आहे तोपर्यंत बरा राहतो.

**–काचोद्भव**–न., **लवण० सामुद्रम्** ( रा. ६.४४ )
समुद्राचे मीठ.

**–कारक**–न., **आसुत० सूक्तम्, चुक्रम्** ( ध. ६.२४६ )
शिरका.

**–कुरण्ट**–पु., वनस्पति० कुरण्टकभेदः (रा. १०.४१९) द्र० ' कुरण्टक. ' निळी कोऱ्हांटी.

**–कुसुमा**–स्त्री., वनस्पति० कुरण्टकभेदः (रा. १०.४१९) द्र० ' कुरण्टक ' निळी कोऱ्हांटी.

**–केशी**–वनस्पति० नीलिनी ( रा. ४.३५० ) काळादाणा.

**–क्रान्ता**–स्त्री., वनस्पति० विष्णुक्रान्ता ( रा. ५.१७३ ) विष्णुक्रांता.

**–गन्धिन्**–न., खनिज० नीलगर्भारुणवर्णं माणिक्यम्, तत् नीलवर्णं गङ्गोदकसमुद्भूतं नीलवर्णान्तरारुणवर्णप्रभायुक्तम् ( र. ४.११ ) एक माणिक. ज्याच्या लालसर वर्णात निळ्या वर्णाची छटा आहे. हे गंगेमध्ये होते.

**–ग्रीव**–पु., देवता० श्रीशङ्करः ( र. १३,३८ ) शंकर.

**–ग्रीवगलालय**–न., विषम् ( र. १३.३८ ) विष.

**–घृत**–न., घृत० असाध्यकुष्ठहरम् घृतमिदं पानाभ्यङ्गयोरुपयुज्यते ( सुचि. ९.२९.३२ ) कावळी, काळाउंबर, इत्यादींनी सिद्ध असे तूप. हे असाध्य कुष्ठावर पिणे. अभ्यंगाकरिता उपयुक्त.

**–ज्योतिस्**–वि., वनस्पति० भीमलता, एषा बुन्दीसन्निधौ वर्तमाने दुर्गे रात्रौ नीलवर्णेन प्रकाशमाना उपलभ्यते ( र. ४.४६ ) नीलज्योति, भीमलता, ही बुंदीजवळच्या किल्ल्यावर रात्री निळ्या रंगात चमकते. दिव्य वनस्पती. पारा हिच्यात खलला असतां चांगला मूर्च्छित होतो, एकजीव होतो.

**नीलदूर्वा, तृणरूपा दिव्यौषधिः** ( र. १८.४७ ) निळी दूर्वा, दूर्वाप्रकार.

**नीलज्वालाभिधा लता** ( र. २६,३३ ) नीलज्योति.

**–झिण्टी**–स्त्री., वनस्पति० कुरण्टकभेदः (रा. १०.१९) द्र० 'कुरण्टक' निळी कोऱ्हांटी.

**–तरु**–पु., वनस्पति० नारिकेलः ( रा.११.१०४ ) नारळ, माड.

**–ताल**–पु., वनस्पति० तमालः ( रा. ९.१५ ) ताड. निळा ताड.

**–तुत्थ**–न., खनिज० मयूरतुत्थम् ( र. १४.२० ) मोरचूद.

**–दूर्वा**–स्त्री., वनस्पति० दूर्वाभेदः ( ध. ४.१४३ ) द्र० ' दूर्वा ' दूर्वाप्रकार.

**–द्रुम**–पु., वनस्पति० सर्जकभेदः ( रा. ९.२०९ ) द्र० ' सर्जक ' राळेचा वृक्ष. एक प्रकार.

**–ध्वज**–पु., वनस्पति० तमालः ( रा. ९.१५ ) तमाल. निळा ताड.

**–नामा**–पु., वनस्पति० व्रीहिः ( रा. १६.१०८ ) तांदळाचा. एक वर्ग.

**–निर्यासक**–पु., वनस्पति० सर्जकभेदः नीलबीजः ( रा. ९.२०९ ) राळ, राळेचा प्रकार.

**–पङ्कज**–न., वनस्पति० नीलपद्मम् ( रा. १०.२३९ ) निळे कमळ.

**–पत्र**–पु., सर्जकभेदः ( रा. ९.२०९ ) द्र० 'सर्जक' राळप्रकार.

**गुण्डः** ( रापरि. ८.६० ) लांब व वाटोळ्या कांडाची तीन कोनाची तीन धारेची हिरव्या पानांची पाण्याच्या आश्रयाने होणारी वनस्पती.

**दाडिमः** ( रा. ११.९४ ) डाळिंब.

**–(पत्री)**–स्त्री., वनस्पति० नीलिनी ( रा. ४.३४९ ) काळादाणा.

**–पद्म**–न., वनस्पति० तद्गुणाः–स्वादु शीतं सुगन्धि रुच्यं केश्यं पित्तघ्नं च ( ध. ४.१५० ) निळे कमळ. गोड, थंड, सुगंधि, रुचि उत्पन्न करणारे, केसांना हितकर, पित्तनाशक.

**–पिष्टौण्डी**–स्त्री., वनस्पति० नीलाम्ली ( रापरि. ४.३८ ) गोड, रुचकर, वातकफनाशक एक वनस्पती.

**–पुनर्नव**–पु., वनस्पति० पुनर्नवाभेदः (रा. ५.४१०) द्र० ' पुनर्नवा ' पुनर्नवाप्रकार.

**(पुनर्नवा)**–स्त्री., पुनर्नवाभेदः ( रा. ५.४११ ) द्र० ' पुनर्नवा ' पुनर्नवाप्रकार.

**–पुष्प**–पु., वनस्पति० निर्गुण्डी (ध. ४.८१) निर्गुंडी.

**भृङ्गराजभेदः** ( रा. ४.२२ ) माक्याचा प्रकार.

**–( पुष्पा )**–स्त्री., वनस्पति० गिरिकर्णी ( ध. ४.८५ ) गोकर्णी.

**( –पुष्पी )**–स्त्री., वनस्पति० गिरिकर्णी ( ध. ४.११५ ) गोकर्णी.

**विष्णुक्रान्ता** ( ध. ४.११५ ) विष्णुक्रांता.

**नीलिनी** ( रा. ४.३४९ ) काळादाणा.

**अतसी** ( ध. ६.११५ ) अळशी.

**–पुष्पिका**–स्त्री., वनस्पति० अतसी ( रा. १६.१८६ ) अळशी, आळशी, जवस.

**–पोर**–इक्षु० अयं वातलः कफपित्तघ्नः सकषायो विदाही च ( सुसू. ४५.१५४ )

उंसाचा प्रकार. हा तुरट वातूळ कफपित्तनाशक घशाशी आंबट आणणारा.

**–फला**–स्त्री., वनस्पति० जम्बूः ( रा. ११.१२८ ) जांभूळ.

**–बीज**–पु., वनस्पति० सर्जकभेदः ( रा. ९.२०९ ) द्र० ' सर्जक ' राळेचा प्रकार.

**–भृङ्गराज**–पु., वनस्पति० भृङ्गराजभेदः ( रा. ४.२२ ) निळा माका.

**–मक्षिका**–स्त्री., कीट० मक्षिकाभेदः ( सुसू. ३०.१० ) एक माशी, निळी माशी.

**–मञ्जरी**–स्त्री., वनस्पति० निर्गुण्डीभेदः शेफाली ( ध. ४.८३ ) निर्गुंडीचा प्रकार. निळी निर्गुंडी, काळी निर्गुंडी.

**–मण्डल**–न., वनस्पति० परूषकम् ( रा. ११, ८४ ) फालसा.

**–मल्लिका**–स्त्री., वनस्पति० कपित्थः ( रा. ११.१५५ ) कवठ.

**–माष**–पु., वनस्पति० राजमाषः ( ध. ६.८४ ) चवळी.

**–मृत्तिका**–स्त्री., खनिज० पुष्पकासीसम् ( ध. ३.१२५ ) निळा हिराकस. हिरवट हिराकस.

**–मेह**–पु., रोग० षट्पित्तजप्रमेहेष्वेकः, तल्लक्षणम्– पित्तस्य परिकोपे चाषपक्षनिभमल्पं मूत्रं मेहति ( चनि. ४.३१ ) सफेनमच्छं नीलं मेहति ( सुनि. ६.११; असंनि. १०.२२ ) पित्तज सहा प्रमेहांपैकी एक. निळा प्रमेह. पित्ताच्या प्रकोपाने चास पक्ष्याच्या पंखाप्रमाणे निळसर आणि थोडी लघ्वी होते. स्वच्छ निळा पण फेसाळ लघ्वी होते.

**–लोह**–न., खनिज० वर्तलोहम् ( रा. १३.३४ ) पांच धातूंचा मिश्रधातु-पंचधातु.

**–वर्ण**–न., वनस्पति० परूषकम् ( ध. ५.६२ ) फालसा ( ध. ५.६२ ) द्र० जम्बू. फाळसा.

**( –वर्णा )**–स्त्री., वनस्पति० जाम्बूभेदः काकजम्बूः ( ध. ५.८४ ) द्र० ' जम्बू ' जांबूळ आकार.

**–वर्षाभू**–स्त्री., वनस्पति० नीलपुनर्नवा ( रा. ५.४१० ) द्र० पुनर्नवा निळा पुनर्नवा.

**–वृक्ष**–पु., वनस्पति० नीलः ( रा.९.११ ) नीळ, निळी

**–वृन्तक**–न., वनस्पति० तूलम् ( ध. ५.६४; रा. ९.८६ ) निळ्या देठाच्या चांगल्या सुंदर वनस्पती.

**–शिग्रु**–पु., वनस्पति० शिग्रुभेदः ( रा. ७.६२ ) द्र० ' शिग्रु ' शेवग्याचा प्रकार. निळा शेवगा. काळा शेवगा.

**–शिलाजतु**–न., खनिज० ताम्रपर्वतजन्यं शिलाजतु ( र. २३.८० ) तांब्याच्या पर्वतात होणारा शिलाजतु.

**–सार**–पु., वनस्पति० तिन्दुकः ( ध. ५.४० ) टेंभुरणी. निळ्या-काळया बीची.
सर्जकभेदः ( रा. ९.२०९ ) राळेचा एक वृक्ष.

**–सिन्दुक**–पु., निर्गुण्डीभेदः शेफालिका ( रा. ४.११९ ) निळ्या फुलांची निर्गुंडी; एक प्रकार.

**( सिन्दुका )**–स्त्री., निर्गुण्डी ( ध. ४.८१ ) निर्गुडी. निळ्या फुलांची.

**–स्पन्दा**–स्त्री., वनस्पति० गिरिकर्णी ( ध. ४.८५ ) गोकर्णी. निळी गोकर्णी.

**नीलक**–पु., वनस्पति० नीली ( र १०.८७ ) असाणा.
उपविष० कृष्णापत्रो धत्तूरः ( र. १०.८७ ) काळा धोतरा.
असनः ( रा. ९.२०७ ) असाणा.
भृङ्गराजभेदः ( रा. ४.२२ ) काळा माका.

**( नीलिका )**–स्त्री., क्षुद्ररोग० तत्सम्प्राप्तिलक्षणे–प्रकुपितं पित्तं शोणितं प्राप्य शुष्यति, तस्य नीलिका जायते ( चसू. १८.२५ ) एक क्षुद्ररोग. दुष्ट पित्त रक्तात येऊन सुकते त्यामुळे निलिका होतात.
शोकक्रोधादिकुपिताभ्यां वातपित्ताभ्यां मुखादन्यत्र गात्रे कृष्णं मण्डलं जायते । तत् वातात् परुषस्पर्शं श्यावं च । पित्तात् ताम्रान्तमानीलं मण्डलम् । कफात् श्वेतान्तं कण्डूमन्मण्डलम् । रक्तात् रक्तान्तमताम्रं सोषं चिमिचिमायमानं मण्डलं भवति ( असंउ. ३६ )
शोक क्रोध इत्यादींनी कुपित झालेले वातपित्त तोंडाखेरीज इतरत्र काळे मंडळ उत्पन्न करितात. त्याला नीलिका म्हणतात. वाताने खरखरीत व काळे, पित्ताने तांबड्या कडेचे निळे, व कफाने पांढरट खाजयुक्त मंडळ होते. रक्तामुळे आग, चिमचिम अललेले लाल कडेचे तांबडे मंडळ असते.
चत्वारिंशत्पित्तविकारेष्वेकः ( चसू. २०.१४ ) चाळीस पित्तविकारांतील एक.
रक्तदोषजरोगेष्वेकः ( चसू. २८.१२; असंसू. २०.१४ ) रक्तदोषापैकी एक.

**नेत्ररोग० लिङ्गनाशः तिमिराख्यः काचसंज्ञितो दृष्टिचतुर्थपटलगतः सन् नीलिका भवति** ( सुउ. ७.१८ )
दृष्टीचा रोग. चवथ्या पटलात तिमिर किंवा काच नावाचा रोग गेला की नीलिकारोग होतो.
**वनस्पति० नीलिनी** ( चक्र. ११.१४; ध. १.२३२; र. १०.९४ ) काळादाणा.
**निर्गुण्डीभेदः शेफालिका** ( रा. ४.११९ )
काळी निर्गुंडी.
**खनिज० वङ्गम्** ( ध. ६.१३ ) कथील.
**नीलाञ्जनिका** ( सुचि. ९.३७ )
निळा-काळा-सुरमा.

**-काच**-पु., **नेत्ररोग० लिङ्गनाशः, चतुर्थपटलगते दोषे काचसंज्ञितस्तिमिरः** ( डसु. ७.१८ )
दृष्टिविकार. चवथ्या पडद्यात दोष गेल्यावर निळा काच नावाचा रोग उत्पन्न करतात.
**स्नेह**-पु., **श्रीफलिकास्नेहः, तद्गुणाः-तिक्तः कटुः कषायोऽधोभागदोषहरः क्रमिकफकुष्ठानिलहरो दुष्टव्रणशोधनश्च** ( सुसू. ४५.१२४ )
काळ्या दाण्याचे तेल. **गुण**- कडु तिखट तुरट, खालच्या भागातले दोष हारक ( रेचक ) कफवात-हर, कृमि, कुष्ठनाशक व दुष्टव्रणाची शुद्धि करणारे.

**नीलाञ्जन**-न., **खनिज० अञ्जनम्** ( रा. १३.२१५ )
काळा सुरमा.
**नीलाञ्जनगुणाः-गुरु, स्निग्धं नेत्र्यं दोषत्रयापहं रसायनं सुवर्णघ्नं लोहमार्दवकारकम्** ( र. ३.१०८ )
**गुण**-जड स्निग्ध तिन्ही दोषनाशक. डोळ्याला हितकर, सर्वधातुपरिपोषक. धातूला मऊ करणारे. व सोन्याचे भस्म करणारे.

**( नीलाञ्जनी )**-स्त्री., **वनस्पति० कालाञ्जनी** ( रापरि. ४.४३ ) सुरमा. काळा सुरमा.

**नीलाण्डग**-पु., **पशु० गवयः** ( धपरि. ६.३५ )
गवा, रानगाय.

**नीलाब्ज**-न., **वनस्पति० नीलपद्मम्** ( रा. १०.२३९ )
निळे कमळ.

**नीलाभ्र**-न., **कृष्णवज्राभ्रकम्, कृष्णाभ्रम्** ( र. १७.६७ )
काळे अभ्रक, काळे वज्र जातीचे अभ्रक.

**नीलाम्बर**-न., **वनस्पति० तालीसपत्रम्** ( रा. ६.८३ )
तालीसपत्र.

**नीलाम्लान**-पु., **वनस्पति० आर्तगला** ( रा. १०.४१७ )
निळी कोऱ्हांटी.

**नीलाम्ली**-स्त्री., **वनस्पति० तद्गुणाः—मधुरा, रुच्या कफवातहरा च** ( रापरि. ४.३८ )
एक आंबट **वनस्पति० गुण**—गोड रुचकर कफ-वात नाशक.

**नीलालिकुलसङ्कुला**-स्त्री., **वनस्पति० कुब्जकः** ( ध. ५.१४६ ) काटेशेवती.

**नीलालु**-पु., **वनस्पति० तद्गुणाः— मधुरः शीतः पित्तघ्नः पित्तदाहश्रमापहश्च** ( रापरि. ७.३२ )
काळा अळू. हा गोड थंड पित्तनाशक दाह श्रम नाशक.

**नीलाश्मज**-न., **खनिज० तुत्थम्** ( रा. १३.२०५ )
मोरचूद.

**नीलाश्मन्**-पु., **खनिज० राजावर्तः** ( ध. ६.६० )
राजावर्त रत्न. निळी छटा असलेला हिरा.

**नीलिनी**-स्त्री., **वनस्पति० तिक्ता ( कटुः ) ( रा. ) उष्णा केश्या कफघ्नी ( वातकफघ्नी ( रा. ) कटिदोषविषोदरवातरक्तकृमिनाशिनी कासामगुल्मज्वरापहा च** ( रा. ) ( ध. १.२३२ )
हिं.—नील.
**म.—नीळ. गुळी.**
गु.—गळी.
बं.—नीलगच्छी.
त.—अवरि, अवुरि.
फा.—दओरो. खाट्-ए-निला.
नीळ. गुळी. कडु, उष्ण, केसांना हितकर, कफनाशक, कंबरेतले दोष, विष, उदर, वातरक्त, कृमि, खोकला, आम, गुल्म, ज्वरनाशक; काळादाणा.
**नीलसमाह्वा, नीलबुह्वा ( ध्मा ), ( चक्र. ) अस्याः फलपत्राणि विरेचकानि** ( चसू. २.९ )
काळादाणा, पाने व फळ रेचक.
**नीलाञ्जनिका** ( चसि. १०.२६; चचि. ३.२९९ )
काळादाणा.
**नीलपुष्पा, श्रीफलिका** ( सुचि.३७.१५ )
काळादाणा.
**नीलाञ्जनिका, शारदं फलम्** ( ड. ) **विरेचने उपयुक्ता** ( सुचि. ३१.५ ) काळादाणा.
**रजनिका, शारदफला** ( ड. सुउ. ६१.३६ )
काळादाणा.
**पशु० गवयः** ( ध. परि. ६.३४ ) गवा, वनगाय.

**-घृत**-न., **स्नेह० गुल्मप्लीहकुष्ठश्वित्रजठरव्यङ्गशोफज्वरपाण्डुरोगोन्मादहरम्** ( असंचि. १६ )

नीलिनी तूप–काळादाणा चिकणा इत्यादींनी सिद्ध तूप. गुल्म, प्लीहा, कुष्ठ, कोड, उदर, वांग, सूज, ताप, पांडु, उन्मादनाशक.

**नीली**–स्त्री., **वनस्पति०** ( सुचि. २५.२८ ) काळादाणा.

**–दल**–न., **नीलाञ्जनिकापत्रम्** ( सुचि. २५.२८ )
काळ्या दाण्याच्या वेलीचे पान.

**–रोग**–पु., **क्षुद्ररोग० नीलिका** ( सुचि. १३.३५ )
त्वचेवरचे तीळ किंवा वांग.

**नीलोत्पल**–न., **वनस्पति० कुमुदम्** ( रा. १०.२४८ )
निळे कमळ.
**दाहप्रशमनगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१७ )
दाहशमनगणातील एक द्रव्य.
**कल्कोऽस्य दाहनाशनकवलग्रहणार्थमुपयुज्यते** ( सुचि. ४०.६७ )
याची चटणी दाहनाशक गुळण्यांकरिता उपयुक्त.

**नीलोत्पलादिप्रलेप**–पु., **कल्प० नेत्ररोगेषु प्रलेपनार्थः** ( सुउ. १२.७ )
निळे कमळ इत्यादींचा लेप. नेत्ररोगांवर.

**नीलोत्पलादिशतपाकतैल**–न., **सिद्धतैल० इदं सर्ववातविकारनुत् शुक्रवर्धनं गर्भदं आक्षेपकहिक्का कासाधिमन्थगुल्मश्वासान्त्रवृद्धिघ्नं च** ( सुचि. १५.४५-४७)
निळे कमळ इत्यादींचे शंभर वेळा उकळून सिद्ध केलेले तेल. सर्व वातविकार नाशक. शुक्रवर्धक. आचके, उचकी, खोकला, डोळे येण्याचा उपद्रव, गुल्म, श्वास व अंतर्गळ नाशक.

**नीलोत्पलिनी**–स्त्री., **वनस्पति० कुमुद्वती** (रा. १०.२५०)
निळे कमळ.

**नीलोद्धतसिरा**–स्त्री., **लक्षण० कृष्णोद्धतसिरा** ( सुचि. ८.११ )
निळ्या शिरा वर दिसू लागलेली. वर दिसू लागलेली निळी शीर.

**नीवार**–पु., **धान्य० उडिका** ( चक्र. चचि. २९.५० ) **उलिकाधान्यम् तद्विविधम्-एकं धान्यसदृशविटपं धान्यक्षेत्रजं द्वितीयं महादलकाण्डंतु सलिलजम् अरण्यशालि-रक्तशूक-प्रसाधिका इति तन्नामानि** ( सुसू. ४६.२१; सुसू. २०.५ )
देवभात. २ प्रकार. एक धान्यासारखे झाड शेतात लावतात व दुसरे पाण्यात मोठी कांडे व पाने असलेले. रानभात. लाल कुसळी ही नावे. वरी, जिरगे भात असेही म्हणतात.

**नीवारगुणाः–कषायो मधुरः शीतः स्निग्धः (रा.) लघुः ( पथ्यः ) ( रा. ) वातलः शोषणश्च** ( चसू. २७.१७; रा. ६.८७ )
हिं.—तीनी, नीवार, पुनेरा.
**म.—देवभात.**
गु.—नानवी. वंटी.
बं.—उडीधान.
**गुण**–तुरट गोड थंड स्निग्ध हलका पथ्यकर वातूळ व शोषक.

**नीहार**–पु., **अवश्यायः हिमम्** ( चशा. ५.१४ )
दंव, धुके, बर्फ.

**–निलय**–पु., **पर्वत० हिमालयः** ( र. १.११ )
हिमालय.
**वनस्पति० चोरकः** ( र. २०.२२२ ) चोरओवा.

**नुर**–पु., **नु अपमानं राति ददातीति नुरो रिपुः** ( र. २०.२२२ )
नु म्हणजे अपमान राति म्हणजे देतो तो नुर म्हणजे शत्रु.

**नृ**–पु., **मनुष्यः** ( असंउ. २० ) मनुष्य.

**–कपाल**–न., **शारीर० नरस्य कपालास्थि नेत्ररोगेषु सन्धावादौ उपयुज्यते** ( असंउ. २० )
मनुष्याच्या कवटीचे हाड. डोळ्याच्या रोगात उपयुक्त. संधाव इ० अंजनप्रकार.

**–करोटिका**–स्त्री., **मनुष्यस्य कपालास्थि** (र. २३.४७)
माणसाचे कवटीचे हाड.

**–ग**–पु.. **नृप० मनुपुत्रोऽसौ शर्यातिनामा** (चचि. १९.४ )
एक राजा. हा मनूचा मुलगा. त्याचे नाव शर्याति.

**–शंसाभिप्रायता**–स्त्री. **लक्षण० हिंसाप्रियता, परापकाररुचित्वम्** ( चक्र. चनि. ७.११ )
हिंसेची आवड असणे. हिंसाप्रियता. दुसऱ्याला अपकार करण्याची आवड.

**नृणात्तलिङ्गा**–स्त्री., **तृतीयप्रकृतिः षण्ढः** ( असंशा. २.५१)
तृतीयप्रकृति. षंढ, नपुंसक.

**नृत्तकौण्डक**–पु., **वनस्पति० मर्कटकः** ( ड. ) **श्वासघ्नोऽसौ** ( सुउ. ५१.३४ )
ओवा, अजमोदा, श्वासनाशक.

**नृप**–पु., **राजा** ( सुक. १.२८ ) राजा.
**वनस्पति० राजादनी** ( ध. ५.९१ ) खिरणी. चार.
न., **वनस्पति० तगरम्** ( ध. ३.५३ ) तगर.

**-कन्द**-पु., वनस्पति० पलाण्डुभेदः राजपलाण्डुः ( रा. ७.१०४ ) द्र० 'पलाण्डु'
पांढरा मऊ चवदार कांदा.

**-द्रुम**-पु., वनस्पति० राजादनः, राजादनी ( रा. ११.१४६ ) खिरणी. चार.

**-प्रिय**-पु., वनस्पति० अपर्वदण्डः ( रापरि. ८.३६ )
माळव्यात रामबाण नावाने प्रसिद्ध वनस्पती.
आम्रः ( रा. ११.३ ) आंबा.
पलाण्डुभेदः, राजपलाण्डुः ( रा. ७.१०४ )
द्र० 'पलाण्डु' पांढरा मऊ कांदा.

**( -प्रिया )**-स्त्री., वनस्पति० केतकी ( रा. १०.१ )
केवडी.
व्रीहिः ( रा. १६.७८ ) तांदळाचा प्रकार.
खर्जूरीभेदः, राजखर्जूरी ( रा. ११.६८ ) द्र० 'खर्जूरी'
श्रेष्ठ खजूर.

**-प्रियफला**-स्त्री., वनस्पति० वार्ताकी ( रा. ७.१२८ )
वांगे.

**-बदर**-पु., वनस्पति० बदरभेदः राजबदरः ( रा. ११.१६० ) द्र० 'बदर' मोठे गोड बोर.

**-मङ्गल्यक**-न., वनस्पति० आहुल्यम् ( रापरि. ४.३४ ) तरवड. तरोटा.

**-माष**-पु., वनस्पति० राजमाषः ( ध. ६.८४ )
चवळी.

**-वर्त**-पु., रत्न० राजावर्तः ( र. १५.७० )
हिऱ्याचा प्रकार.

**-वल्लभ**-पु., वनस्पति० राजाम्रः ( रा. ११.९ )
उत्कृष्ट आंबा.

**( -वल्लभा )**-स्त्री., वनस्पति० केविका ( रापरि. १०.३३ )
एक वनस्पती.

**-वृक्ष**-पु., वनस्पति० आरग्वधः, किरमालकः ( ड. सुउ. ५७.९ ) बहावा.
गिरिमालकः ( ड. सुउ. ४२.६१ ) एक वनस्पती.

**नृपात्मज**-पु., वनस्पति० राजाम्रः ( ध. ५.११ )
उत्कृष्ट आंबा.
राजाम्रभेदः ( रा. ११.१० ) द्र० 'राजाम्र'
एक उत्कृष्ट आंबा.

**नृपान्न**-न., धान्य० व्रीहिः ( रा. १६.८१ )
तांदळाचा एक वर्ग.

**नृपाह्वय**-पु., वनस्पति० पलाण्डुभेदः राजपलाण्डुः द्र० 'पलाण्डुः' ( रा. ७.१०२ ) पांढरा मऊ चवदार कांदा.

**नृपेष्ट**-पु., वनस्पति० पलाण्डुभेदः राजपलाण्डुः द्र० 'पलाण्डु' ( रा. ७.१०४ )
पांढरा मऊ स्वादिष्ट कांदा.
बदरभेदः राजबदरः ( रा. ११.१६० )
द्र० 'बदर' उत्तम बोर.

**नृपोचित**- पु., वनस्पति० राजमाषः ( ध. ६.८४ )
चवळी.

**नृपोपल**-पु., खनिज० राजावर्तः ( ध. ६.६० )
एक हिरा.

**नेकराज**-पु., वनस्पति० भृङ्गराजः ( काखिल. १३.१९ )
माका.

**नेतृ**-पु., वनस्पति० निम्बः ( ध. १.२९ ) कडुनिंब. निंब.
निर्गुण्डी ( रा. ४.११७ ) निर्गुंडी.

**नेत्र**-न., बस्तिनेत्रम्, उत्तरबस्तिधूमयन्त्रबस्त्यादीनां नेत्रम् ( चसि. ११.२१; अहसू. १९.७१ )
बस्तियंत्राची नळी. धूमयंत्र, उत्तरबस्तियंत्राची नळी.
सङ्ख्यासङ्केतः द्विसङ्ख्यावाचकः ( र. २६.५४ )
संख्येबद्दल एक संकेत. दोन संख्येचा वाचक.
यन्त्रम् ( ड. सुचि. ३५.१ ) यंत्र.
व्रणप्रक्षालनयन्त्रम् ( सुचि. २.७३ )
व्रण धुण्याचे यंत्र.
नलिका, बस्तिनलिका ( सुचि. ३५.१२ )
बस्तीची नळी.
शारीर० ज्ञानेन्द्रियेष्वेकम् चक्षुः, वामदक्षिणभेदेन ते द्वे, शीर्षस्य प्रत्यङ्गे ( सुशा. ५.४ ) तत्रापि नेत्रे श्लेष्मणः प्रसादात् शुक्लमण्डलं तत् पितृजम्। असृजश्च कृष्णमण्डलं तन्मातृजम् मध्ये दृष्टिमण्डलं तदुभयात्मकम् ( सुशा. ३.३३ ) मज्ज्ञः प्रसादादपि नेत्रयोरुत्पत्तिरनुमीयते। नेत्रयोरुपरि मज्ज्ञः सारासारत्वस्य वृद्धिक्षययोश्च इष्टानिष्टपरिणामदर्शनात्। महानेत्रं च मज्ज्ञा ( सुसू. ३५.१६ ) मज्जा नेत्रांगगौरवम् ( वासू. ११.११ ) मज्जानिभ्रमस्तिमिरदर्शनम् ( वासू. ११.१९ ) इत्यादि वचनेभ्यः। पक्ष्मवर्त्मशुक्लकृष्णदृष्ट्याख्यानि पञ्चमण्डलानि। तत्सन्धयश्चत्वारः। द्वौ चापाङ्गकनीनयोः। इति ते षट्। पक्ष्मवर्त्मनोरेकः, वर्त्मशुक्लयोर्द्वितीयः, शुक्लकृष्णयोस्तृतीयः, कृष्णदृष्ट्याख्ययोश्चतुर्थः, नेत्रापाङ्गयोः पञ्चमः, नेत्रकनीनकयोः षष्ठ इति षट्। अपाङ्गः कर्णदिशि, कनीनकं नासादिशि ( इन्दु. ) तन्मानम्-सार्धमङ्गुलद्वयं नेत्रदैर्घ्यम्।

एतत्-त्रिभागं तु कृष्णमण्डलम्। (सुउ. १.१३) षट् च पटलानि। द्वे वर्त्मनी। बाह्यं च आश्रितमग्न्यम्भसी द्वितीयं मांसं तृतीयं मेदश्चतुर्थमस्थि तेषां बहलता दृष्टेः पञ्चमांशेन। (असंशा. ५.५१-५२) नेत्रबुद्बुदमानम् – स्वाङ्गुष्ठोदरमितं द्व्यंगुलबाहुल्यं सर्वतश्च सार्धद्व्यङ्गुलम् (सुउ. १.१०) तर्पणपुटपाकसेकाश्च्योतनाञ्जनादीनि नेत्ररक्षाकराणि (सुउ. १८.४) हीनतर्पितनेत्रलक्षणम् – रूक्षमाविलमस्राढ्यं – रूपदर्शनासहत्वं व्याधिवृद्धिश्च (सुउ. १८.१५) अत्यर्थतर्पितनेत्रलक्षणम् –गुर्वाविलमतिस्निग्धम् अश्रुकण्डूपदेहयुक्तं दोषसमुत्क्लिष्टं नेत्रं भवति (सुउ. १८.१४८) सम्यक्तर्पितनेत्रलक्षणम् – सुखस्वप्नः सुखावबोधत्वं नेत्रस्य मलाभावः श्वेतत्वादिवर्णस्य यथार्थग्रहणं तात्कालिकं सुखं व्याधिविध्वंसो निमेषोन्मेषादीनां क्रियाणां शीघ्रता च (सुउ. १८. १३) नेत्रपुटपाके हीनयोगः – अश्रु हर्षणं दोषोद्गमश्च (सुउ. १८.३२) नेत्रपुटपाकेऽतियोगः–रुजः शोफः पिडकास्तिमिरोद्गमश्च भवति (सुउ. १८.३२) नेत्रपुटपाके सम्यग्योगः – नेत्रं प्रसन्नवर्णं विशदं वातातपसहं लघु सुखस्वप्नावबोधि च भवति (सुउ. १८.३१) पुटपाककृते तर्पितनेत्रे च वर्ज्यानि – दीपज्वालादितेजांसि सम्मुखवायुराकाशमादर्शआदित्यादीनि भास्वराणि च (सुउ.१८.२९) तर्पणायोग्यः कालः – दुर्दिनात्युष्णशीतेषु कालेषु चिन्तायासभ्रमेष्वशान्तोपद्रवेऽक्षिण च तर्पणमप्रशस्तम् (सुउ. १८.१८) मन्दविरिक्तनेत्रलक्षणम् – अक्ष्युदग्रतरदोषवद् भवति (सुउ. १८.७८) अतिविरिक्तनेत्रलक्षणम् – जिह्मं दारुणदुर्वर्णं स्रस्तमतीव रूक्षमतिमात्रशो नेत्रं स्यन्दते (सुउ. १८.७६–७७) सुविरिक्तनेत्रलक्षणम् – विशदं लघु क्रियापटुनास्रावि सुनिर्मलं संशान्तेपद्रवं भवत्यक्षि (सुउ. १८.७५–७६) अतितर्पणनेत्रलक्षणम् – प्रसादनाञ्जनातियोगे चक्षुः किञ्चिद् हीनविकारं स्यात् (सुउ. १८.८१) प्रसन्ननेत्रलक्षणम् प्रसादनाञ्जने सम्यग्युक्ते सति नेत्रं स्नेहवर्णबलोपेतं प्रसन्नं दोषवर्जितं सर्वक्रियाक्षमं भवति (सुउ. १८.७९) अतिविघट्टितनेत्रलक्षणम् – रागाश्रुवेदनास्तम्भहर्षा नेत्रे तादृशे भवन्ति



(सुउ. १७.७७) नेत्ररक्षा– त्रिफला रुधिरस्रुतिर्विशुद्धिर्मनसो निवृतिरञ्जनं नस्यं शकुनाशनता पादपूजा घृतपानं चेति नेत्ररक्षणानि (असंउ. १६) डोळा. शरिराचा अवयव. ज्ञानेंद्रियांपैकी एक. डावा उजवा असे दोन. डोक्याचे प्रत्यंग. डोळा कफ धातूच्या प्रसादरूप अंशापासून झाला आहे. पांढरे मंडल पित्याच्या नेत्र घटकापासून झाले आहे. काळे मंडळ रक्ताच्या प्रसादांशापासून झाले आहे. ते मातेच्या नेत्र घटकापासून. मधले दृष्टिमंडळ— बाहुली माता व पिता यांच्या बाहुलीच्या घटकापासून. पापणीचे केस, पापण्या, पांढरे व काळे बुबुळ आणि बाहुली अशी पाच मंडळे, त्यांचे संधि चार आणि नाकाकडील व कानाकडील एकेक असे एकूण सहा. केस व पापण्या यांचा पहिला संधि, पापण्या व पांढरे मंडळ यांचा दुसरा, पांढरे व काळे यांचा तिसरा, काळे व बाहुली यांचा चौथा, डोळ्याचा अपांगाशी कानाकडचा पाचवा व कनीनिकेशी नाकाकडचा सहावा संधि होय. सहा पडदे. दोन पापण्या. बाह्य पडद्यात अग्नि म्हणजे रक्त व अम्भ म्हणजे रस, दुसऱ्यात मांस तिसऱ्यात मेद व चवथ्यात अस्थि आश्रित आहेत त्याची जाडी बाहुलीच्या एक पंचमांश. डोळ्याचे प्रमाण–आंगठ्याच्या मधल्या भागाच्या लांबीची दोन अंगुळे डोळ्याचा गोल आत असतो. अडीच अंगुळे सर्व बाजूंनी विस्तार असतो. तर्पण पुटपाक सेक आश्चोतन व अंजन इत्यादी उपचार डोळ्याचे रक्षण करणारे आहेत. तर्पण–डोळा भरणे. तूप दूध यात डोळा बुडेल व तो तृप्त होईल असा विधि तर्पण होय. पानांच्या पुटात औषध घालून भाजून त्या रसाचा उपयोग वरीलप्रमाणे करणे पुटपाक होय. द्रव्ये डोळ्यावर शिंपडणे सेक, डोळ्यात औषधांचे थेंब घालणे आश्चोतन, व औषध डोळ्यात सारवणे यास अंजन म्हणतात. **तर्पण कमी झाले असेल तर**—डोळा रूक्ष गढूळ आसूनी भरलेला, पहाणे असह्य व रोगवृद्धि. **अति तर्पण झाले तर**—डोळा जड गढूळ अतिस्निग्ध आंसू खाज मळ युक्त होऊन दोष उचंबळतात. **योग्य तर्पण झाले तर**— सुखाची झोप व सुखाने जागे होणे, मळ नसणे. रंग बरोबर ओळखता येणे लाली नाहीशी होणे व ताबडतोब बरे वाटणे डोळ्याची उघडझाप झटकन् करता येणे.

**पुटपाकाचा उपचार कमी झाला तर**— आसू स्रवणे, फुरफुरणे, दोष निर्माण होणे. **पुटपाकाचा अति उपयोग झाला तर**— वेदना, सूज, पुळया, आंधळेपणा, वाढत जाणे. **पुटपाकाचा योग्य उपयोग केला तर**— डोळा प्रसन्न त्याचा वर्णही प्रसन्न स्वच्छ वारा व ऊन सहन करणारा हलका, सुखाने झोप येणे व सुखाने जाग येणे. **पुटपाक व तर्पण केले असताना वर्ज्य**— दिवा जाळ इत्यादी, तेजस्वी वस्तु समोरचा वारा, आकाश आरसा, सूर्य इत्यादी तेजस्वी पदार्थ. **तर्पणास अयोग्य काळ**— ढग, पाऊस, वारा सारखा असून सूर्यदर्शन नाही, अतिशय उकडते अति थंडी वाजते अशा दिवशी, चिंता श्रम भ्रम असताना, डोळ्याच्या रोगांचे उपद्रव कमी झाले नाहीत तर तर्पण देऊ नये. **डोळयांची शुद्धि थोडी झाल्यास**—डोळ्यातले दोष अधिक वाढतात. **शुद्धि फार झाली तर**— डोके वाकडे कडक रंग वाईट गळालेले अतिरूक्ष व अतिशय गळतात. **योग्य शुद्धी झाली तर**— डोळा स्वच्छ हलका हालचाल व पहाण्याची क्रिया उत्तम होते. गळ नसते डोळा फार निर्मळ असतो व उपद्रव शांत होतात. **अतितर्पण झालेल्या डोळयांची लक्षणे**—तर्पण योग अति वापरल्याने डोळ्याचा विकार फारसा कमी होत नाही. प्रसन्ननेत्रलक्षण- प्रसादन अंजनाचा योग्य उपयोग केल्याने डोळ्याची स्निग्धता, रंग आणि पाहाण्याची शक्ति चांगली होऊन डोळा निर्दोष होतो व सर्व क्रिया व्यवस्थित होतात डोळ्यात सळईचा उपयोग करताना **डोळा फार चाळवला गेल्यास**—तो लाल होतो आसू स्रवतात वेदना होतात ताठरतो व फडफडतो. **डोळयाचे रक्षण**—रक्तस्राव करणे डोळा शुध्द करणे, मनाची व्यग्रता नाहीशी करणे, अंजन, नाकात औषध घालणे, पायाचे रक्षण व तूप चोळणे, पक्ष्यांचे मांसादिभक्षण. त्रिफळासेवन, व तूप पिणे ही डोळ्याची रक्षक होत.

**–कोश**–पु., **शारीर० नेत्रपुटकम्** ( असंसू. ३३.४ ) डोळ्याचा कोश, डोळ्याचे पूड, डोळ्याची खोबण.

**–गौरव**–न., **लक्षण० मज्जावृद्धिजविकारेष्वेकः, अक्षिजाड्यम्** ( अहसू. ११.११ ) डोळ्याचा जडपणा. डोळे जड वाटणे मज्जेची वृद्धि झाल्याचे एक लक्षण.

**–तर्पण**–न., **उपक्रम० नेत्रपूरणम्** ( असंसू. ८.३४ ) डोळा तूप इत्यादींनी भरणे.

**–नाडी**–स्त्री., **नेत्ररोग० तल्लक्षणम्–कनीनकसंधौ नेत्रात् दोषयुक्तोऽश्रुस्रावः** ( सुउ. २.५ ) डोळ्याची नाडी–नाकाकडील सांध्यात डोळ्यातून दोषयुक्त आसू गळणे.

**मण्डलसंधिस्थानम्** ( सुशा. ५.२७ ) मंडळांच्या सांध्याची जागा.

**अक्षिविवरम्** ( चसि. २.२१ ) डोळ्याचे भोक, खोबण, खाच.

**–नैर्मल्यकरी**–स्त्री., **खनिज० तुल्यम्** ( **ध.** ३.१४६ ) मोरचूद.

**–पटल**–न., **नेत्रच्छदः** ( असंशा. ५.५९ ) डोळ्याचा पडदा.

**–पाक**–पु., **नेत्ररोग० स द्विविधः सशोफजोऽशोफजश्च, तत्र सशोफजनेत्रपाकलक्षणानि–कण्डूरुपदेहपक्वौदुम्बरसन्निभत्वं दाहः संहर्षस्ताम्रत्वं शोफो निस्तोदो गौरवं मुहुः रक्तस्रावः पिच्छिलत्वमुष्णशीताम्बुनः स्रावः क्षुब्धत्वं चाक्षिणि जायन्ते तथाऽक्षि पच्यते** ( सुउ. ६.२१-२२ ) **अशोफजनेत्ररोगे शोफवर्जं एतान्येव लक्षणानि भवन्ति** ( सुउ. ६.२२-२३ ) डोळा पिकणे–हा रोग दोन प्रकारचा. (१) सूजयुक्त (२) सूजविरहित. (१) सूजयुक्त डोळा पिकलेल्या उंबरासारखा दिसतो. खाज मळ, आग, फडफड, ओली टोंचणी जडपणा मधून मधून रक्तस्राव बुळबुळीत ऊन थंड आसूंचा स्राव डोळा अगदी क्षुब्ध होतो व पिकतो. (२) सूज नसते बाकीची हीच लक्षणे.

**–पुष्करा**–स्त्री., **वनस्पति० रुद्रजटा** ( रापरि. ३.२५ ) चांगल्या सुगंधी पानाची सुगंधी जटा (बारीक-पाळे मुळे ) असलेली वनस्पती.

**–प्रक्षालन**–न., **उपक्रम० नेत्रधावनम्** (सुचि.२४.१६) डोळे धुणे.

**–बल**–न., **दृक्शक्तिः दर्शन-सामर्थ्यम्** (अहसू.८.४४)डोळ्याची शक्ति सामर्थ्य-बळ-ताकद.

**–बस्तिप्रमाणप्रविभागचिकित्सित**–न., **अध्याय०** ( सुचि. ३५ ) अध्यायाचे नाव-यात बस्ति, बस्तीची नळी यांचे प्रमाण व इतर माहिति यांना अनुसरून उपचार.

**–बस्तिव्यापच्चिकित्सित**–न., अध्याय० (सुचि. ३६) अध्यायाचे नाव-यात बस्तींची नळी इत्यादीं-मुळे होणाऱ्या उपद्रवांचे उपचार सांगितले आहेत.

**–बस्तिव्यापत्सिद्धि**–स्त्री., अध्याय० (सुचि. ५) बस्ति. बस्तीची नळी इत्यादी मुळे होणाऱ्या उपद्र-वांचे उपचार.

**–बुद्बुद**–न., अक्षिगोलकः (सुउ. १.१२) द्र० 'नेत्र' डोळ्याचा गोळा. डोळ्याचा गोलक.

**–मीला**–स्त्री., वनस्पति० यवतिक्ता (ध. १.२५६) सांखवेल.

**–मूल**–न., बस्तिनेत्रस्य मूलस्थानम्, बस्तिमुखे बन्धेन योजनीयो नेत्रस्य भागः (सुचि. ३५.१६) बस्तीची नळी बस्तीवर जेथे बसते ते ठिकाण. बस्तीच्या तोंडावरचा भाग. यावरच नळी दोरीने बांधून बसवितात.

**–रक्षा**–स्त्री., दृग्रक्षणम्, त्रिफलारुधिरस्रुतिर्विशुद्धि-र्मनोनिर्वृत्त्यादिभिर्नेत्ररक्षणं भवति (असंउ. १६) दृष्टीचे-डोळ्याचे रक्षण. त्रिफळासेवन. रक्तस्राव डोळ्याची शुद्धि, मन निर्वृत्त होणे इत्यादींनी होते.

**–रोग**–पु., रोग० अक्षिरोगः तन्निदानम्–उष्णाभि-तप्तस्य जलप्रवेशात् दूरेक्षणादिभिः। तथा चन्द्रसूर्योपरागदर्शनात् नेत्रामया भवन्ति (सुउ. १.२६.२७)

तत्सम्प्राप्तिः— अचक्षुष्यैः कुपिताः पित्तानुसारिणो मलाः सिराभिरूर्ध्वं प्रसृताः सन्तो नेत्रावयवं वर्त्म सितं कृष्णं सन्धिं दृष्टिं सर्वमक्षि वाऽऽश्रिता नेत्ररोगान् कुर्युः (सुउ. १. २०.२१; असंउ. ११) तत्सङ्ख्या–चरकमते नेत्ररोगाः षण्णवतिः, वर्त्मस्थाः सप्तविंशतिः, सन्धौ नव, शुक्लस्थास्त्रयोदश, कृष्णभागजाः षट्, दृष्टिस्थाः पञ्चविंशतिः, सर्वगाः षोडश (चचि. २६.१३०) सुश्रुतमते स्थानतः सन्ध्याश्रया नव, वर्त्मजा एकविंशतिः, शुक्लभागे एकादश, कृष्णभागे चत्वारः, सर्वाश्रयाः सप्तदश, दृष्टिजा द्वादश, बाह्यजौ द्वौ, एवं षट्सप्ततिः (सुउ. १.४४.४५) दोषभेदतो वातजा दश, पित्तजा दश, कफजास्त्रयोदश, रक्तजाः षोडश, सर्वजाः पञ्चविंशतिः, बाह्यजौ द्वौ षट्सप्ततिः (सुउ. १.२८) तत्पूर्वरूपाणि— अक्षि शोफाश्रु-कण्डूमलयुतं भवति कफपित्तवातरक्तजनितं गुरू-षातोदरागादि, वर्त्मकोषे शूलः, रूपे क्रियासु चाक्ष्णोर्वर्णहानिनि–मेषोन्मेषादि क्रियाहानिश्च (सुउ. १.२१.२३)

असाध्या नेत्ररोगाः पञ्चदश, पवनप्रभावात्–हत-वर्त्मगम्भीरिकहताधिमन्थनिमिषाश्चत्वारः, पित्तजौ ह्रस्वजाड्यजलास्रावौ द्वौ, कफनिमित्तजः कफस्राव एकः, रुधिरजाः, सव्रणशुक्रशोणितार्शोजकाजातरक्त-स्रावाश्चत्वारः, त्रिदोषजा अलज्यक्षिपाकात्ययना-कुलान्ध्यपूयास्रावाश्चत्वारश्च, सनिमित्तानिमित्ताख्यौ बाह्यजावसाध्यौ याप्यौ वा (सुउ. ८.११)

अशस्त्रकृत्या द्वादश, शुष्काक्षिपाककफविदग्ध-दृष्ट्याम्लाध्युषितक्षतशुक्रकार्जुनपिष्टकाक्लिन्नवर्त्मधूम-दर्शीशुक्तिका प्रक्लिन्नवर्त्मबलासग्रथिताः आगन्त्वामययुग्मेन दूषितदृष्टावपि शस्त्रं नावचार-णीयम् (सु. ८.९.१०) भेद्यः पञ्च–श्लेष्मोपना-हलगणबिसवर्त्मकृमिग्रन्थ्यञ्जननामिकाः (सुउ.८.८) लेख्या नव–उत्साङ्गिनीबहलवर्त्मकर्दमवर्त्मश्यावव-र्त्मबद्धवर्त्मक्लिष्टवर्त्मपोथकीकुम्भीकिनीशर्कराः (सुउ. ८.७) याप्याः–सप्त–अरुणो मारुतजः, पीतः पित्तजो, नीलः पित्तजः, सितः कफजो, रक्तो रक्तजः, विचित्ररूपस्त्रिदोषजः, पक्ष्मकोपश्च (सुउ. ८.११)

व्यध्याः पञ्चदश–शिरोत्पातशिराहर्षशोफाशोफयुक्त-पाकान्यतोवातपूयालसानिलविपर्ययहताधिमन्थश्ले-ष्माधिमन्थरक्ताधिमन्थवाताभिष्यन्दपित्ताभिष्यन्द-श्लेष्माभिष्यन्दरक्ताभिष्यन्दाः (सुउ. ८.८.९) छेद्या एकादश–अर्शोवर्त्मशुष्कार्शोऽर्बुदानि वर्त्मगतानि, सिराजा पिडका शुक्लगता, सिराजं जालं शुक्लगतं, प्रस्तार्यर्मशुष्कार्मरक्तार्माधिमांसार्म-स्नाय्वर्माणि शुक्लगतानि, पर्वणिका सन्धिगता च (सुउ. ८.६)

कफजलिङ्गनाशाद्व्यतिरिक्ताः सर्वे लिङ्गनाशा गम्भीरा ह्रस्वजाः चासाध्याः। नकुलान्ध्यं षट काचाश्च याप्याः। शेषा दृग्व्याधयः साध्याः (असंउ. १५) हताधिमन्थाक्षिपाकात्ययौ त्याज्यौ (असंउ. १८) शुक्तिसिराहर्षसिरोत्पातपिष्टकबलास-ग्रथितार्जुनानि भेषजैः साधयेत्। शुक्लार्मशोणिता-र्मप्रस्तार्यर्मस्नावार्माधिमांसार्मसिराजालसिराजपिटि-काः शस्त्रसाध्याः (असंउ.) उपनाहकृमिग्रन्थिपूयाल-

**सकपर्वणीः शस्त्रेण साधयेत्। अलजीजलास्राव-रक्तास्रावपूयास्रावान् पञ्च शस्त्रकर्मणि त्यजेत्.** ( असंउ. १३ )
**नेत्ररोगे पथ्यतमानि कृष्णसर्पवसा क्षौद्रं धात्रीरसो रसक्रिया च सर्वाक्षिरोगेषु शस्ता** ( असंउ. १९ ) **पुराणयवगोधूमशालिषष्टिककोद्रवमुद्गादयो भूरिसर्पिःपरिप्लुता जाङ्गलं मांसं दाडिमं सिता सैन्धवं त्रिफला द्राक्षा पाने नाभसं वारि पदत्राणमातपत्र-मभ्यञ्जननावनानि विधिवद्दोषशोधनं च** ( असंउ. २० ) **दृष्टेरास्थैर्यलाभात् रूपाणि सूक्ष्म-दीप्तानि सहसा नावलोकयेत्** ( असंउ. १७ )

डोळ्याचे रोग. कारण–कडक उन्हाने किंवा उष्णतेने सर्व शरीर तापल्यावर एकदम थंड पाण्यात बुडणे. दूर सूक्ष्म पहाणे इत्यादी तसेच चंद्रसूर्यांचे ग्रहण पाहाणे यांनी डोळ्याचे रोग होतात. संप्राप्ति–पित्त-बर्धक डोळ्याला अहितकर पदार्थांनी पित्ताबरोबर दोष शिरांनी वर डोळ्यात येऊन पापण्या, पांढरा काळा भाग, सांधे बाहुली किंवा सर्व डोळा यात आश्रित होऊन रोग करतात. **रोगांची संख्या चरक मताने** ९६— पापण्याचे २७ सांध्याचे ९ पांढऱ्याचे १३ काळ्याचे ६ दृष्टीचे २५ सर्व-व्यापी १६ **सुश्रुत मताने** सांध्याचे ९ पापणीचे २१ पांढऱ्याचे ११ काळ्याचे ४ सर्वव्यापी १७ दृष्टीचे १२ बाह्यकारणज २ असे ७६. **दोषभेदाने**— वातज १० पित्तज १० कफज १३ रक्तज १६ सर्वदोषज २५ बाह्यज २ एकूण ७६. **पूर्वरूपे**– डोळ्यास सूज आसूं खाज मळ येतो. कफ पित्त वात रक्त यांची क्रमाने जडपणा आग टोचणी लाली इ. चिन्हें आधिक्याने, पापण्या व डोळा यात शूल. डोळ्याचा वर्ण वाईट होतो व उघडझाप इत्यादी क्रिया कमी होतात. असाध्य रोग १५. वाताचे-वातहत वर्त्मगंभीरिक, हताधिमन्थ व निमिष हे चार. पित्तज–ऱ्हस्व जाड्य जलस्राव हे २, हे कफ-निमित्तज कफस्राव १ रक्तज सव्रणशुक्र शोणितार्श अजका व रक्तस्राव हे ४; त्रिदोषज–अलजी डोळा पिकणे नकुलान्ध्य पूयास्राव हे चार. व बाह्यज दोन्ही असाध्य किंवा पथ्य व औषधोपचारापुरते साध्य होत. शस्त्रक्रिया नको असलेले १२. ते वर आहेत. दोन्ही आगंतुरोगाने दृष्टि वाईट झाली असेल तर शस्त्राचा उपयोग नाही.

भेद्य–फोडण्यासारखे श्लेष्मोपनाह, लगण, बिसवर्त्म कृमिग्रंथि आणि अंजननामिका लेख्य. ( खरडण्या-सारखे ) उत्संगिनी, बहलवर्त्म, कर्दमवर्त्म, श्याव-वर्त्म, बद्धवर्त्म, क्लिष्टवर्त्म, पोथकी, कुंभीकिनी आणि शर्करा ९ याप्य औषधोपचारापुरते बरे असे ७ अरुण, पित्त, नील, रक्त विचित्ररूप आणि पक्ष्म-कोप. व्यध्य ( भोक पाडून दोष काढण्यासारखे ) १५ शिरोत्पात, शिराहर्ष, शोफयुक्त व अशोफयुक्त, पाक, अन्यतोवात, पूय, अलस, अनिलविपर्यय, वाताधिमंथ, श्लेष्माधिमंथ, रक्ताधिमंथ, वाता-भिष्यंद, पित्ताभिष्यंद, श्लेष्माभिष्यंद, रक्ताभिष्यंद छेद्य (कापण्यासारखे) ११–अर्शोवर्त्म, शुष्कार्श, वर्त्म-गत अर्बुदे, शुक्लगत सिरापिडका, शुक्लगत सिराजाल, प्रस्तारिअर्म, शुष्कार्म रक्तार्म अधि-मांसार्म स्नाय्वार्म कफज दृष्टि नाशाखेरीज बाकीचे दृष्टिनाश, गंभीर व ऱ्हस्वज दृष्टिरोग असाध्य. नकुलांध्य व सहा काच रोग याप्य. बाकीचे दृष्टिरोग साध्य. हताधिमंथ अक्षिपाकात्यय हे दोन्ही त्याज्य. शुक्ति सिराहर्ष सिरोत्पात पिष्टक बलास-ग्रथित अर्जुन हे औषधाने साध्य व शुक्लार्म व उपनाह इत्यादि वर दिलेले रोग रक्तार्म अधिमांसार्म, शुक्लगत, स्नाय्वर्म, आणि संधिगत पर्वणिका, शोणितार्म, प्रस्तारिअर्म, स्नाय्वर्म, अधिमांसार्म, सिराजाल सिराज पिटिका हे विकार शस्त्रसाध्य होत.
उपनाह कृमि, ग्रंथी, पूयालसक, पर्वणी हे सुद्धा शस्त्रसाध्य. पण अलजी, जलास्राव, कफास्राव, रक्तास्राव, आणि पूयास्राव हे पांच विकार शस्त्रकार्याच्या बाबतीत त्याज्य होत.

**–रोगहन्**–स्त्री., **वनस्पति० वृश्चिकाली** ( रापरि. ९.७ ) विंचवी.

**–लेह**–वि., **कृमि० कफजोऽयं, नेत्रगतमांसादि च लेढीति नेत्रलेढा** ( सुउ. ५४.१४ )
कफज कृमि डोळ्यातील मांस इत्यादी खाणारे.

**–वर्त्मन्**–न., **नेत्रपक्ष्म** ( ड. सुसू. ८.१८ )
डोळ्याची पापणी.

**–विकारजित्**–न., **वनस्पति० कतकम्** ( ध. ३.१७ )
निवळी, डोळ्यांचा रोग जिंकणारी.

**–विनाश**–पु., **अरिष्ट–लक्षण० दृष्टिनाशः यश्चन्द्र-सूर्ययोः पतनं स्वप्ने पश्यति तस्य नेत्रविनाशो भवति** ( असंशा. १२.१८ )

दृष्टीचा नाश जो स्वप्नांत चंद्र व सूर्य खाली पडतात असे पहातो त्याचे डोळे जातात.

**–विष**–स्त्री., अक्षिपुरीषम् तच्च मांसस्य मलः ( सुसू. ४६.५२७ )
डोळ्यांचा मळ तो मांसाचा मळ.

**–विभ्रम**–पु., लक्षण० नेत्रस्योर्ध्वगमनादि स्वरूपं चलनम् ( चसि. ७.४५ )
डोळ्यावर खाली इ यादी दिशेने फिरवणे.

**–संवेजन**–न., लक्षण० नेत्रकम्पनम् (सुचि. ३६.२६)
डोळ्याचा कंप फडफडणे डोळा थरथरणे.

**–स्तम्भ**–पु., लक्षण० अक्षिस्तब्धता (अहसू. २२.२६)
डोळा निश्चल असणे, न हालणे.

**नेत्रान्त**–पु., नेत्रस्य पर्यन्तः ( असंशा. ८.३९ )
डोळ्याची कड , कडा.

**नेत्राभिष्यन्द**–पु., नेत्ररोग० संक्रामकोऽयम् ( सुनि. ५.३४ )
डोळे येणे. हा एकाचा दुसऱ्यास होतो. म्हणून याला संक्रामक रोग म्हटले आहे.
मज्जदोषजविकारेष्वेकः ( सुसू. २४.९ )
मज्जेच्या दुष्टीने होणारा एक रोग.

**नेत्रामय**–पु., नेत्ररोगः ( चचि. २६.१३०; अहसू. २.४ ) डोळ्याचे रोग.

**नेत्रायाम**–पु., नेत्रदैर्घ्यम् ( सुउ. १.१२ )
डोळ्याची लांबी.

**नेत्रारि**–पु., वनस्पति० स्नुही ( रा. ८.३५६ )
नेत्रशत्रु. डोळ्याचा शत्रु.

**नेत्राम्र**–न., नेत्रजलम् अश्रु (सुशा. ४.५० )
डोळ्याचे पाणी. आसू. अश्रु.

**नेत्रोपदेह**–पु., नेत्रमलः ( असंशा. ११.३ )
डोळ्याचा मळ.

**नेत्रौषध**–न., खनिज० पुष्पकासीसम् ( ध. ३.१२५ )
हिराकस.

**नेत्र्य**–वि., नेत्राय चक्षुषे हितम् ( र. ३.१११ )
डोळ्याला हितकर.

**नेपाल**–न., खनिज० ताम्रभेदः नेपालदेशीयखनिलब्धं ताम्रम् ( र. ५.५० ) नेपाळात सांपडणारा तांब्याचा एक प्रकार.

**(नेपाली)**–स्त्री., खनिज० मनःशिला ( र. ३०.६३; सुउ. ३९.२६३ ) मनशीळ.
वनस्पति० वनमल्लिका ( ध. ५.१४० )
रानमोगरा.

**–जा**–स्त्री., खनिज० मनःशिला ( सुउ. १९.१४ )
मनशीळ.

**–जाता**–स्त्री., खनिज० मनःशिला ड. सुउ. ११.१६ ) मनशीळ.

**–निम्ब**–पु., वनस्पति० किराततिक्तभेदः ( रा. ९.५२ )
द्र० ' किराततिक्त ' काडेचिराइताचा प्रकार.

**नेपालक**–न., वनस्पति० जयपालः ( र. १२.४७ )
जयपाळ.
खनिज० ताम्रम् ( रा. १३.११ ) तांबे.

**( नेपालिका )**–स्त्री., खनिज० मनःशिला ( ध. ३.९६ )
मनशीळ.

**नेपालाद्यञ्जन**–न., सिद्धयोग० एतत् काचार्मनेत्रस्राव-तिमिरशुक्लपिल्लनाशनम् ( र. २३.५१ )
एक सिध्द औषध. काचबिंदु डोळ्याची गळ तिमिर, शुक्र पिल्ल हे डोळ्याच्या पांढऱ्या भागाचे जुने रोग नाशक

**नेपालेक्षु**–पु., इक्षु० पौण्ड्रकः ( रा. १४.१८३ )
द्र० 'इक्षु 'नेपाळातला एक प्रकारचा ऊस.

**नेमि**–पु., पक्षि० चक्रवाकः ( चइ. १.१४ )
चक्रवाकपक्षी.

**–वृक्ष**–पु., वनस्पति० खदिरभेदः, सोमवल्कः ( ध. १.२७ ) द्र० ' खदिर ' खैराचा प्रकार.

**–सन्धानक**–पु., पञ्चदशकर्णबन्धेष्वेकः चक्रधाराव-त्सन्धानं अस्य ( सुसू. १६.१० )
कान बांधण्याच्या पंधरा बंधन प्रकारापैकी चाकाच्या धारेसारखा एक प्रकार.

**नैकान्त**–पु., तन्त्रयुक्ति० अन्यतरपक्षानवधारणम्, यथा ये ह्यातुराः केवलाद् भेषजादृते म्रियन्ते न च ते सर्वे एव भेषजोपपन्नाः समुत्तिष्ठेरन् इत्यादि ( चसि. १२.४३ )
एक तंत्रयुक्ति. कोणत्याही एका पक्षाचे प्रतिपादन नसणारे. जसे जे रोगी केवल औषध नसल्यामुळे मरतात, ते सर्वच औषध मिळाले असता जगतात असे नाही.

**नैगमेष**–पु., बालग्रह० पितृग्रहेष्वेकः, एतच्चुष्टलक्षणम्- शिशुःफेनोद्वामीमध्यविनामीऊद्वेजितऊर्ध्वेद्रक्ष्रोदनः क्षीयमाणो वसागन्धिको भवति। सज्वरश्च भवति ( सुउ. २७.१६ ) आध्मानं पाणिपादस्पन्दनं तृट् मुष्टिबन्धोऽतिसारस्स्वरदैन्यं विवर्णता कूजनं स्तननं कासो हिध्मा प्रजागर ओष्ठदंशोऽसङ्कोचस्तम्भ

**बस्ताभगन्धता ऊर्ध्वं निरीक्ष्य हसनं मूर्च्छा एकनेत्रशोफश्च इत्यधिकानि लक्षणानि** ( असंउ. ३ )
एक बालग्रह याने धरल्याची **लक्षणे**–बाळ फेस ओकणारा मध्यभागी वाकतो त्रासलेला, वर पहाणारा, रडणारा दिवसेदिवस क्षीण होणारा, व चरबी सारखी घाण येणारा. (सु.) पोट फुगणे, हातपाय थरथरणे, कापणे. मुठी घट्ट वाळलेला. वर्ण वाईट झालेला कण्हणारा शब्द खोल गेलेला कुंथणारा ओठ चावणारा बोकडाच्या अंगाच्या घाणीसारखी घाण येणारा खांदा आखडलेला संकुचित, खोकला तहान उचकी मूर्च्छा एका डोळ्यावर सूज अतिसार व झोप नसणे ही असतात, वर पाहून तो हसतो.

**( नैगमेषी )**–स्त्री., **बालग्रह० नैगमेषस्त्रीग्रहः** ( काइ. )
एक बालग्रह (स्त्री).

**–प्रतिषेध**–पु., अध्याय० ( सुउ. ३६ )
अध्यायाचे नांव. नैगमेष ग्रहाचे उपचार यात सांगितले आहेत.

**नैचुल**–वि., **निचुलस्येदम् फलम् निचुलो वेतसः** (ड. सुचि. २२.२०) जलवेतसाचे (फळ फूल इ.)

**–फल**–न., (परिव०) **वेतसफलम्**
( ड. सुउ. ५१.२३ ) जलवेतसाचे फळ.

**नैपाल**–पु., **वनस्पति० किराततिक्तभेदः, नेपालनिम्बभेदः** ( रा. ९.५२ ) **द्र० 'किराततिक्त'**
काडेचिराइताचा प्रकार.
**इक्षु० अयं वातलः कफपित्तघ्नः सकषायो विदाही च** ( सुसू. ४५.१५४ )
एक ऊस-हा वातूळ कफ-पित्तनाशक तुरटसर घशात जळजळ करणारा.

**नैपालीज**–स्त्री., **खनिज० मनःशिला** (सुउ. १४.४; सुउ. ६०.४९ ) मनशीळ.

**नैर्ऋत**–न., **मूलनक्षत्रम्** ( इन्दु. असंउ. ४१ ) मूळ नक्षत्र.
पु., **द्वादशो मुहूर्तः** ( इन्दु. असंउ. ४१ )
बारावा मुहूर्त.

**( नैर्ऋती )**–स्त्री., **दिग्विशेषः, दक्षिणपश्चिमयोरन्तरे विघ्नाना उपदिक्, अस्यामेव रसशालानिहितानि शस्त्रकर्मणि निर्वर्त्यानि** ( र. ७.२ )
एक पोट दिशा. दक्षिण व पश्चिम यांच्या मधली दिशा. नैर्ऋत्य.

**–भाग**–पु., **राक्षसानां विभागः, गर्भस्य ओजोरूपोऽशो नैर्ऋतभागः, तत एवाष्टमे मासि जातो न जीवति** ( सुशा. ३.३० ) **अष्टमे मासे नैर्ऋतभागत्वाद् भूतावसरत्वात् तस्य कालस्य गर्भस्य मरणमाहुः** ( इन्दु. असंशा. २ )
राक्षसांचा हिस्सा. गर्भाचा ओजरूप अंश, हा राक्षसांचा हिस्सा. तो आठव्या महिन्यात नैर्ऋतग्रह ते खातात म्हणून आठव्या महिन्यात झालेले मूल मरते.

**–मारुत**–पु., **नैर्ऋतदिग्भवो वायुः, असौ ग्रीष्मेऽसुखो भवति। तदा जन्तवो ज्वरिता इव भवन्ति** ( सुसू. ६.२९; असंसू. ४.२८ )
नैर्ऋत्येकडचा वारा. हा उन्हाळ्यात सुखाचा नाही. त्यामुळे प्राणी ज्वर आल्यासारखे होतात.

**नैषध**–पु., **धान्य० शालिभेदः** ( चनि. ४.५; ड. सुसू. ४६.४ ) **द्र० 'शालि'** साळीचा प्रकार.

**नैषधक**–पु., **शूकधान्य० शालिः** ( चसू. २७.१२ )
साळ, तांदूळ.

**नैष्ठिक**–वि., **निष्ठा, निश्चयः, तद्भवं नैष्ठिकम् निश्चयेन कर्तव्यम्** ( चक्र. चवि. ८,८० )
निष्ठा, निश्चय. निष्ठेने-निश्चयाने केलेले.

**(नैष्ठिकी)**–वि., **मोक्षसाधिका (बुद्धिः)**
( चशा. ५.२६ ) मोक्ष साधणारी बुद्धि.
**निष्ठाऽत्यन्तदुःखमोक्षरूपा तदर्थभूता चिकित्सा** (चक्र.) ( चशा. १.९४ )
निष्ठा; अत्यंत दुःखापासून मुक्ति. तिच्यासाठी करावयाची चिकित्सा ( उपचार ) ती.

**नैसर्गिक**–वि., **निसर्गात्सञ्जातं निसर्गदत्तम्** ( चसू. २६.७३ )
निसर्गापासून झालेले. निसर्गदत्त.

**नोदन**–( परिव० ) ( न., ) **प्रेरणम्** ( सुउ. ४०.१३७ )
प्रेरणा, गति देणे.

**नौ**–स्त्री., **वनस्पति० शमी** ( रा. ८.१५२ ) शमी.

**न्यग्रोध**–पु, **वृक्ष० वटः** ( ध, ५.७६ ) वड.

**(न्यग्रोधा)**–स्त्री., **वनस्पति० द्रवन्ती** ( धनि. १.२२९ )
उंदीरकानी.

**(न्यग्रोधी)**–स्त्री., **वनस्पति० द्रवन्ती** ( चक्र. १२.३ ) ( धनि. १.२२९ ) उंदीरकानी ?
**वनस्पति० सुतश्रेणी** ( रा. परि. ४.१६ )
एक वनस्पती ?

**–पल्लव**–न., पु., **शाक० शीतं कषायं स्तम्भनं पित्तातिसारिणां हितम्** ( चसू. २७.१०५ )
वडाची कोवळी पाने, भाजी. थंड तुरट, स्तंभनव पित्तातिसारीला हितकर.

**–पाद्**–पु., वटप्ररोहः, ( चक्र. चचि. २१.७३ )
वडाची पारंबी. अंकुर.

**–वर्ग**–पु., द्रव्यगण० **न्यग्रोधादिगणः पाण्डुरोगशमनः** ( सुउ. ४४.२७; सुसू.३७.२९ )
वड इत्यादींचा गण. पांडुरोगनाशक.

**–शुङ्ग**–न., **वटस्य कोमलाङ्कुरः गर्भस्थापनोपयोगि** ( चशा. ८.२४ )
वडाचे कोवळे अंकुर. गर्भस्थापनेकरिता उपयोगी.

**–न्यग्रोधादि**–वि., **वटप्रभृतिवर्गः ग्रन्थौ प्रदेहपरिषेकार्थमुपयुज्यते** ( असंउ. ३५; सुउ. ४०.८५ )
वड इत्यादी वर्ग. गाठीवर लेप व काढ्याने शिंपडणे याकरिता उपयुक्त.

**न्यग्रोधादिकषाय**–पु., कल्प० **अयं क्वाथो दह्यमानप्रमेहेष्वास्थापनार्थमुपयोज्यः** ( सुचि. ११.७ )
वड इत्यादींचा काढा. हा जळजळ होणाऱ्या प्रमेहात शोधनबस्ति देण्याकरिता उपयुक्त.

**न्यग्रोधादिगण**–पु., द्रव्यगण० **न्यग्रोधोदुम्बराश्वत्थप्लक्षमधूककपीतनककुभाम्रकोशाम्रचोरकपत्रजम्बूद्वयपियालमधूकरोहिणीवञ्जुलकदम्बबदरीतिन्दुकीसल्लकीरोध्रसावररोध्रभल्लातकपलाशनन्दीवृक्षाश्चेति । अयं व्रण्यः सङ्ग्राही भग्नसाधको रक्तपित्तहरो दाहमेदोघ्नो योनिदोषहरोऽस्ति** (सुसू. ३८.४८-४९; असंसू. १६.३५–३६; अहृसू. १५.४१ )
वड इत्यादींचा गण. वड, उंबर, पिंपळ, पिंपरी, ज्येष्ठमध, आंबाडा, अर्जूनसादडा, आंबाडा रानआंबा, लाखेचा वृक्ष, तमालपत्र, जांभूळ, (दोन्ही) चारोळी, मोहाची फुले, कायफळ, जलवेतनस, कळंब बोर, टेंभुरणी, साळई, रोध्र, शावररोध्र, भिलावा, पळस पारोसा पिंपळ, हा व्रणाला हितकर अस्थिभंग सांधणारा मळसंग्राहक रक्तस्राव थांबविणारा दाह मेद व योनिदोष नाशक.
**पित्तप्रशमनवर्गोक्तो गणः** ( सुसू. ३९.८ )
पित्तशामक वर्गातील गण.

**न्यग्रोधादिपल्लव**–पु., न., शाक० **न्यग्रोधोदुम्बराश्वत्थप्लक्षपद्मादीनां पल्लवाः, इमे कषायाः शीतास्तम्भनाः पित्तातिसारिणां हिताश्च** ( चसू. २७.१०५ )
वड इत्यादिकांची कोवळी पाने पाले भाजी. वड उंबर , पिंपळ , पिंपरी , कमल , इत्यादींची पाने. ही तुरट थंड मलस्तंभन करणारे पित्तातिसारी रोग्याला हितकर.

**न्यग्रोधादिसिद्धसर्पिस्**–न., **सिद्धघृत० पित्तश्वयथौ पानोपयोगि** सुचि. ( २३.११; असंचि. १९ )
वड इत्यादी द्रव्यांनी सिध्द तूप. पित्तज सुजेवर पिण्यास उपयोगी.

**न्यग्रोधिका**–स्त्री., वनस्पति० **आखुकर्णी** (रापरि. ३.२१ )
उंदिरकानी.

**न्यङ्कु**–पु., **आनूपमृग० बहुश्रृङ्गः , न्यङ्कुशो हरिणः**, (चक्र.चसू.२७.३९) **कूलचरवर्गोक्तः**,(सुसू.४६.९४)
सांबर, अनेक शिंगांचे हरिण. पाण्याच्या काठी चरणाऱ्या प्राण्यांपैकी.
**जङ्गाल० तद्गुणाः– पित्तश्लेष्महरः किञ्चिद्वातकरो लघुर्बलवर्धनश्च** ( धपरि. ६.३-४ )
जांघ ज्यांची पुष्ट आहे अशा प्राण्यांपैकी. मांसाचे **गुण**–हलके कफपित्तहारक बलवर्धक किंचित वातकर.

**न्यच्छ**–न., क्षुद्ररोग० **अस्याधिष्ठानं द्वितीयालोहिता त्वक्** ( सुशा. ४.४ ) **पित्तरक्तान्वितो वायुरस्य कारणम्** ( गयी सुनि. १३.४४ ) **रक्तदोषजविकारेष्वेकः** ( सुसू. २४.९ ) **तल्लक्षणम् – गात्रे महदल्पं वा श्यामं सितं वा सहजं नीरुजं यन्मण्डलं तन्न्यच्छम्** ( सुनि. १३.४४ )
**लाञ्छनमिति लोके** ( ड. सुनि. १३.४४ )
लांछन. क्षुद्ररोग. याचे अधिष्ठान दुसरी त्वचा लोहिता. वायु रक्तपित्तान्वित होऊन हा विकार करितो. रक्त दोषज विकार-अवयवावर लहान वा मोठे, काळे वा पांढरे वेदना नसलेले जे मण्डळ जन्मतः वा नंतर दिसते ते.

**न्युब्ज**–वि., **अधोमुखम्** (चशा. ८.२९; सुचि. ३५.१६)
खाली तोंड केलेला, उपडा, पालथा.

**–शयन**–न., ( **परिव०** ) **अधोमुखशयनम्** ( काखिल. ११.१८ )
खाली तोंड करून झोपणे. उपडे-पालथे झोपणे.

**न्यून**–न., वाक्यदोष० **प्रतिज्ञाहेतूदाहरणोपनयनिगमनानामन्यतमेनापि अवयवेन न्यूनं, रहितमेव न्यूनम् । अथवा बहूपदिष्टहेतुकमेकेन हेतुना साध्यते तन्न्यूनम्** ( चवि. ८.५४ )
रहित, कमी, वाक्यातला दोष. साध्य सिद्ध करताना प्रतिज्ञा हेतु उदारण उपनय निगमन अवयवांपैकी कोणतेही एक कमी असणे. किंवा ज्याला पुष्कळ कारणे आहेत ते साध्य एका हेतूने सिद्ध करण्याचा प्रयत्न करणे ते न्यून.

# आयुर्वेदीय महाकोश

अर्थात्

# आयुर्वेदीय शब्दकोश

## संस्कृत-संस्कृत-मराठी द्वितीय खण्ड

( प ते ह )

संपादक व भाषान्तरकार

आयुर्वेदाचार्य वेणीमाधवशास्त्री जोशी

आयुर्वेदविशारद नारायण हरी जोशी




१९६८

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ
मुंबई

# आयुर्वेदीय - शब्दकोशः

## प



**पक्ति**–पु., जाठराग्निः, **पच्यते विपाकं जरणं वा नीयते अनया इति पक्तिः यद्वा पच्यते इति पक्तिः, तद्वानपि पक्तिः** ( सुउ. ४०. १३; चचि. ३. १३० )
जठराग्नि. ज्याच्याने पचते तो, पचणारा, पचविणारा.
**अग्निस्थानम्** ( ड. सुसू. ४६.४९७ )
अग्निस्थान. अग्नीचे स्थान, नाभि, पित्ताशय.
**पाचनम्** ( सुसू. १५.४ )( २ ) पचन.

–**द**–वि., **पाकोत्पादकम्, पाचकम्** ( अहृसू. ४.२९ )
पाचक, पचन करणारा.

–**रस**–पु., **आहाररसः, तत्प्रमाणम्-नवाञ्जलयः शरीरे,** ( काशा. )
आहार रस, आहार पचल्यानंतर त्याचा झालेला रस त्याचे शरिरातील प्रमाण - नऊ ओंजळी.

–**रुज्**–स्त्री., लक्षण० **परिणामशूलो, यश्च भुक्तेऽन्ने पच्यमाने उपजायते** ( र. ४.१८ )
परिणामशूल. ( जो अन्न खाल्ल्यानंतर ते पचत असताना उत्पन्न होतो. )

–**शूल**–पु., लक्षण० **पक्तिरुक्, भुक्तान्ने जीर्यति जरणं वा गच्छति सति जायमानः शूलः** ( र. १८.१४३ )
अन्न जिरताना व जिरल्यानंतर होणारा शूळ.
रोग० **परिणामशूलः** ( र. ३० ३८ )
परिणामशूळविकार.

–**स्थान**–न., **अग्निस्थानम्** ( सुउ. ३९.१८ )
अग्नीचे स्थान, नाभि, पित्ताशय.

**पक्तृ**–वि., **जाठराग्निः** ( चचि. १५.३९ )
जठराग्नि. पाचक अग्नि, पाचक पित्त.

–**वेग**–पु., **अग्निबलम्** ( असंसू. ३६.३५ )
अग्नीचा पचवण्याचा वेग-बळ.

**पक्त्रिम**–वि., **पाकाभिनिर्वृत्तम्** ( सुसू. ४२.११ )
शिजवून तयार झालेले, मीठ.
( न., ) **फुल्लालवणम्** ( ड. सुसू. ४२.११ )
मिठाचे नाव, फुलवलेले मीठ.

**पक्व**–वि., **निरामम्** ( चसि. ८.२०; सुउ. ४०.१८ )
आमरहित.
**पाकमुपगतम्** ( सुसू. ३१.१२ )
पक्व. कालपक्कम् '**कालः पचति भूतानि कालः संहरते प्रजाः' इति पक्कपदमपि कालपक्कं नाम मृत्युग्रस्तमित्यर्थे प्रकरणवशाद् गृहीततात्पर्यम्** ( ड. चसू. ६.४६ ड. सुसू. ३१.१२; चइ. ४.२२ )
काळाने पक्व, मरणास टेकलेला.
( न., ) **वनस्पति**० **कुरी** ( रा. १६.१७९ )
तृणधान्य, गवतीधान्य.

–**गुद**–वि., लक्षण० **पाकमुपगतं गुदं यस्य सः** ( चचि. १९.९ ) ज्याचे गुद पिकले आहे असा.

–**जाम्बवतीप्रकाश**–वि., लक्षण० **पक्कजम्बूफलसदृशवर्णम्** ( सुचि. ६.४ )
पिकलेल्या जांभळाच्या रंगासारखे.

–**पीनस**–पु., **रोगावस्था, पाकप्राप्तः पीनसः** ( चचि. २६.१४५ )
पिकलेले पडसे, पडश्याची मधली एक अवस्था.

–**मूषा**–स्त्री., मूषा० **कुलालभाण्डरूपा दृढा परिपाचिता मूषा पक्का हण्डिका घटो वा सेयं पोट्टल्यादिविपाचनोपयोगिनी** ( र. १०.२८ )
पक्की भाजलेली मूस. कुंभाराने पक्की केलेली व भाजलेली मूस. भाजलेली हंडी, मडके. पाऱ्याची पोटली इ. पचविण्याकरिता उपयुक्त.

–**रस**–पु., आसुत० **सीधुभेदः पक्केनेक्षुरसेन कृतं मद्यसीध्वासवादि** (चचि. ७.४४; अहृसू. ५.७४-७५)
उसाचा रस शिजवून केलेले आसव; शिरका दारू इत्यादी.

–**लोष्ट**–पु., न., **भृष्टमृत्तिका या च दाहप्रशमनबस्त्यर्थे उपयुक्ता** ( चसि. ७.१४ )
भाजलेले ढेकूळ, माती. ढेकूळ तापवून विझवलेले व नंतर स्वच्छ गाळून घेतलेले पाणी दाह नाशनाकरिता व बस्तीकरिता उपयुक्त.

न., भृष्टलोष्टम्, तृष्णाहरणार्थम् एतन्निक्षेपणशीतलीकृतं जलं ( चचि. २२.४२ ) भाजलेले ढेकूळ. याने विझवलेले पाणी तहाननाशक म्हणून उपयुक्त.

**-शोणिताभ**-वि., लक्षण० **पक्वशोणितमिव रक्तकृष्णवर्णयुतं रूपं यस्य** ( चचि. १९.९ ) पचलेल्या रक्तासारखे तांबडे काळे दिसणारे स्वरूप ज्याचे तो ( मळ. )

**-शोथ**-पु., **शोथस्य पक्वावस्था** ( चचि. २५.५६ ) सुजेची पक्वावस्था. पिकलेली सूज.

**-शोफ**-पु., (परिव०) **पक्वावस्थां गतः शोफः** ( सुसू. १७.१० ) पिकण्याच्या अवस्थेला गेलेली सूज. पिकलेली सूज.

**पक्वाण्ड**-पु., वनस्पति० **तद्गुणाः—कटुर्नस्याञ्जनविधौ शस्तो जीर्णज्वरापहश्च** ( रापरि. ८.१६ ) एक तिखट वनस्पती. अंजन करण्यास व जीर्णज्वरास उपयुक्त.

**पक्वातिसार**-पु., **निरामोऽतिसारः** ( असंसू. ३३.६ ) आम पचलेला ( आम नसलेला ) अतिसार.

**पक्वातीसार**-पु., रोग० **निरामोऽतिसारः** (सुसू. ३८.४७) आम नसलेला ( आम पचलेला ) अतीसार.

**पक्वाधान**-न., शारीर० **पक्वमन्नमाधीयते नाम स्थाप्यतेऽस्मिन्निति, पक्वाशयः, वातस्थानमिदम्** ( अहसू. १२.१ ; सुचि. ३६.१४ ) शरीरावयव. पक्वाशय. अन्न पचल्यानंतर जेथे धारण केले जाते ते स्थान, पक्वाशयाचे खाली. वातस्थान, पुरीषाधार, पुरीषाशय, कटी, श्रोणी, वाताशय, अपानस्थान ही पर्याय नावे आहेत.

**पक्वाधानालय**-वि., शारीर० **पक्वाधानम् आलयः स्थानं यस्य सः, अपानो वायुः** ( सुनि. १.१९ ) पक्वाधान हे ज्याचे आलय ( स्थान ) आहे तो. अपानवायु.

**पक्वान्न**-न., **कृतान्नम्** ( असंसू. ७.२१०; अहसू. ६.४२ ) शिजवलेले अन्न.

**पक्वामाशयमध्य**-न., शारीर० **पक्वाशयामाशययोर्मध्यस्थानम् पाचकपित्तस्थानमिदम्** ( अहसू. १२.१० ) पक्वाशय व आमाशय यांच्यामधील आशय. पित्ताशय, ग्रहणी. पाचकपित्तस्थान, पित्तधराकलेचे स्थान.

**पक्वाशय**-पु., शारीर० **आशयः** ( चसू. १४.९ ) **पञ्चदशकोष्ठाङ्गेष्वेकम्** ( चशा. ७.१० ) **पुरीषवहानां स्रोतसां मूलम्** ( चवि. ५.८ ) **पुरीषधरकलायाः स्थानम्** (सुशा. ४.१६) **परिपक्वानामाहारद्रव्याणामाशयः बृहदन्त्रम्** ( हाराणचन्द्रः ) ( सुशा. ९.१२ ) **वामपार्श्वानुगोऽयम्** ( सुचि. ३६.२८ ) **पित्ताशयः** ( ड. सुचि. २.५२ ) **स्थूलान्त्रम्** ( सुशा. ५.८ ) **श्रोणिगुदयोरुपर्यधो नाभेः स्थितः** (सुसू. २१.६) **उत्पत्तिस्थानं वातस्य** ( चचि. १५.११ ) पक्वाशय, शारीर आशय, पंधरा कोष्ठांगातील एक. श्रोणि म्हणजे पक्वाधान पुरीषाशय पुरीषाधार, तो व गुद यांचे वर व नाभीच्या खाली, डाव्या कुशीतला मोठ्या आंतड्याचा भाग. हे पुरीषवह स्रोतसांचे मूळ, पुरीषधरा कलेचे स्थान, परिपक्व आहारद्रव्यांचा आशय. याच परिपक्व आहारापासून उत्पन्न होणाऱ्या वाताचे हे स्थान पित्ताशय, स्थूलान्त्र.

**पक्वाशयगुद**-न., शारीर० **पक्वाशयं गुदं च** ( चशा. ६.२१ ) पक्वाशय आणि गुद.

**पक्वाशयशूल**-न., लक्षण० **पक्वाशये शूलवद् वेदना** (चसू. ७.८) पक्वाशयातील शूल.

**पक्ष**-पु., कालविभाग० **मासार्धम्, पक्ष्यते परिगृह्यते ज्ञाप्यते चन्द्रस्य पञ्चदशकलानामापूरणक्षयो वाऽनेन इति पक्षः। पञ्चदशाहोरात्राणि, शुक्लकृष्णभेदेनासौ द्विविधः** ( सुसू. ६.५ ; सुचि. २५.२९ ) पक्ष. अर्धा महिना. पंधरा दिवस. महिन्यात शुक्ल व कृष्ण असे दोन पक्ष.

**वादाङ्गम्** ( चसू. २५.२६ ) वादातला. संदिग्धसाध्यवान्.

**शरीरार्धम्, वामदक्षिणभेदाद्विविधम्** (सुनि. १.६१) शरिराचा अर्धा भाग.

**-ग्रह**-पु., रोग० **एकाग्रहः, मध्यमार्गानुसार्यसौ** ( चसू. ११.४९ ) एका बाजूचे सर्व अंग जखडल्यासारखे वाटणे. मध्यम मार्गातील विकार.

**-वध**-पु., रोग० **अशीतिवातविकारेष्वेकः** ( चसू. २०.११ ) **माध्यममार्गजोऽयम्** ( चसू. ११.४९ ) **एकाङ्गरोगः** ( चचि. १८.५३ ) **अर्धाङ्गः** ( चचि. २८.३८-४९ ) **तत्सम्प्राप्तिलक्षणानि—मारुतस्तनोर्दक्षिणं वामं वा पक्षमेकं हत्वा सिराः स्नायूश्च विशोष्य सन्धिबन्धान् विमोक्ष्य चेष्टानिवृत्तिं रुजं वाक्स्तम्भं च कुर्यात्। तथैकं पादं हस्तं वा सङ्कोचयति। तोदशूलकृच्च भवति। तेनार्धशरीरमकर्मण्यं विचेतनं भवति** (चचि. २८.५३ ; असंनि. १५)

साध्यासाध्यता – शुद्धवातहतः कृच्छ्रसाध्यतमः, पित्तकफयोरन्यतरेण संसृष्टः कृच्छ्रः क्षयहेतुको विवर्ज्यः ( असंनि. १५.४३ )
पक्षाघात, अर्धांगवात, अर्धांग, एकांगरोग. ऐशी वात–विकारांपैकी एक, मध्यम मार्गातला विकार.
संप्राप्ति व लक्षणे—वात शरिराचा उजवा किंवा डावा पक्ष ( पाखे ) हतबल करून सिरा व स्नायु शुष्क करून संधिबंधने मोकळी करून त्याची हालचाल नाहीशी करतो. व चेतना-संवेदना. स्पर्शज्ञान नाहीसे करतो. वेदना टोचणी शूल होतो, वाचा बसते. हात पाय संकुचित होतात, या प्रमाणे अर्धे शरीर अचेतन व अकर्मकारी होते. **साध्यासाध्यता**—शुध्द वात दुष्टीने झालेला हा विकार अति कष्टसाध्य, पित्त किंवा कफ संयुक्त असेल तर साधारण कष्टसाध्य, आणि क्षयामुळे ( धातुक्षय ) उत्पन्न झाला असेल तर असाध्य.

**–संश्रय**–पु., रागतः पक्षसङ्ग्रहोऽन्यतरपक्षाश्रयणम् ( चसू. २५.२६ )
कोणत्या तरी पक्षावर निष्ठा असल्यामुळे त्याचा आश्रय करणे, त्या पक्षाचा होणे.

**–हत**–वि., लक्षणम्० नष्टार्धभागः ( चसि. २.२१ )
अर्धा भाग नष्ट होणे.

**पक्षाघात**–पु., रोग० पक्षवधः ( चसू. १४.२१ )
अर्धांगवात.

**पक्षान्त**–पु., सम्यगर्थावधारणम्, निर्णयः ( चसू. २५.२७ )
योग्य अर्थ धारण करणे. योग्य निर्णय करणे.

**पक्षिक**–पु., धान्य० व्रीहिः ( रा. १६.१२० )
व्रीहि जातीचे तांदूळ.

**पक्षिन्**–पु., प्राणि० पक्षतिद्वययुक्तो विहगः ( चसू. १३.११ )
पक्षी; दोन पंखयुक्त पक्षी.

**( पक्षि )-नाबल्य**–पु., धान्य० व्रीहिः (रा. १६.१२०)
व्रीहि जातीचे तांदूळ.

**–राज**–पु., धान्य० व्रीहिः ( रा. १६.१२० )
व्रीहि जातीचे तांदूळ.

**पक्ष्मन्**–न., शारीर० वर्त्मभवं रोम, पक्ष्मबालः ( ड. सुउ. ३.२९ ) पापणीचे केस.
**वर्त्मगतरोममालिका** ( सुउ. १६.१ )
पापणीच्या केसांची ओळ.

**( पक्ष्म )-कोप**–पु., नेत्ररोग० उपपक्ष्ममाला, पक्ष्मबालः (ड. सुउ. ३.३०) सर्वजोऽयम्, तत्सम्प्राप्तिलक्षणम्– पक्ष्माशयगता दोषास्तीक्ष्णाग्रखराणि पक्ष्माणि निष्पादयन्ति। तैर्घृष्टं लोचनमुपतप्यते। तेषूत्पाटितेषु वेदनाप्रशमो भवति। वातातपानलांश्च नाभिनन्दति व्याधितः ( सुउ. ३.३० ) याप्योऽयम् ( सुउ. १.३९ )
पापणीचे केसांची दुष्टि. पडकेस. केसांच्या जवळ पापणीतले दोष तीक्ष्ण टोकाचे खरखरीत असे केस उत्पन्न करतात. ते बुबुळांना रुततात, खुपतात, घासतात. त्यामुळे डोळा लाल गरम होतो. ते उपटल्यावर वेदना शमते. वारा, उन्ह, अग्नि, नकोसे वाटतात. हा विकार उपचार चालू असेपर्यंत बरा असतो.

**–कोपप्रतिषेध**–पु., अध्याय० ( सुउ. १६ )
पापणीच्या दुष्टीच्या रोगाचे उपचार वर्णन केलेल्या अध्यायाचे नाव.

**–बाल**–पु., पक्ष्मस्थं रोम ( चचि. १३.३९ )
पापणीचे केस.

**–मण्डल**–न., शारीर० नयनस्य बाह्यमावरणं पटलस्वरूपम् तस्य पटलस्य ऊर्ध्वाधःस्थितस्य मण्डलम् ( सुउ. १.१५ )
पापणीचे मंडळ, वर्तुल, डोळ्याचे बाह्य आवरण. पटलाच्या स्वरूपाचे. वरच्या व खालच्या पापणीचे मंडळ.

**–ल**–वि., घनरोमान्वितम्, पक्ष्मभ्यो हितम् ( सुचि. २४.६६ )
जाड केसांनी–लवेने–युक्त. पापण्यांना हितकारक.

**–शात**–पु., नेत्ररोग० तल्लक्षणम्–पित्तं पक्ष्मान्तमाश्रितं सत् कण्डूं दाहं पक्ष्मणां शातनं च करोति ( असंउ. ११ )
डोळ्याचा रोग. लक्षण–पित्त पापण्यात खाज, दाह, व पापण्यांचे केस गळणे ही लक्षणे उत्पन्न करते.

**पक्ष्माशय**–पु., शारीर० अक्षिरोम्णोऽन्तर्भागो मध्यं वा (सुउ. ३.२९) डोळ्याच्या केसांचा अंतर्भाग. मूळ.

**पक्ष्मोपरोध**–पु., वर्त्मरोगः पक्ष्मप्रकोपः (ड.) तल्लक्षणानि–वर्त्मनां सङ्कोचखरत्वान्तर्मुखत्वादीनि ( सुउ. १६.९; असंउ. ११ )
पापणीचा रोग. पापण्या खरखरीत, संकुचित व आत वळतात.

**पङ्क**–पु., मलः ( चइ. १२.५५ ) मळ. चिखल.
लेपः ( असंचि. ९ ) लेप.

–**ज**–न., वनस्पति० **कुमुदम्** ( ध. ४.१५४ ) कमळ.

–**मलोपदेह**–पु., पङ्कमलाभ्यां लेपः (असंसू. ८.१७) चिखल व मळ यांचा लेप.

**पङ्किल**–वि., **पङ्कयुतम्** ( असंशा. ९.१४ ) चिखलयुक्त.

**पङ्केज**–न., **वनस्पति० कमलम्** ( रा. १०.२४३ ) कमळ.

**पङ्केरुह**–न., **वनस्पति० कमलम्** ( १०.२४४ ) कमळ.

**पङ्क्ति**–स्त्री., पु., **धान्य० व्रीहिः** ( रा. १६.९६ ) व्रीहि जातीचा तांदूळ.

–**कण्टक**–पु., **वनस्पति० अपामार्गः** (रा. ४.३८) आघाडा.

–**कन्द**–पु., **वनस्पति० मालाकन्दः** ( रापरि. ७.४४ ) मालाकंद.

–**बीज**–पु., **वनस्पति० बर्बुरः** ( रापरि. ८.१२ ) बाभूळ.

–**बीजक**–पु., **वनस्पति०कर्णिकारः** ( रा. ९.३३६ ) बाहवा.

**पङ्गु**–पु., **रोग० पङ्गुलवातः** ( ड. सुनि. १.७७ ) **तल्लक्षणम्–द्वयोः सक्थ्नोर्वधात् पङ्गुत्वं भवति** ( सुनि. १.७७ ) **यदा कटिस्थितो वातो द्वयोरपि सक्थ्नोः कण्डरा आक्षिपेत्, तदा पङ्गुत्वं जायते** ( असंनि. १५ )
रोग. पांगळा. दोन्ही मांड्या निकामी झाल्याने पांगळेपणा येतो. कमरेतील वात दोन्ही मांड्यांतल्या कंडरा दुष्ट करतो तेव्हा पांगळेपणा येतो.

–**त्व**–न., **खञ्जत्वम्** ( असंसू. २०.१३ ) पांगळेपणा.

**पङ्गुल**–पु., **वातरोग० पङ्गुत्वम्** ( सुचि.५.२३ )

**पचन**–न., वि., **अग्निसम्पाद्य आहारादिपाकः पाचनम्** ( सुसू. ११.५ ) **पच्यते विपाकं नीयते अनेनेति पचनम्** ( सुसू. ४१.४ (३) पाचन. अन्नपचन.

**पचम्पचा**–स्त्री., **वनस्पति० दारुहरिद्रा** ( ध. १.५९ ) दारुहळद.

**पञ्च**–( परिव० ) वि., **विस्तृतम्** ( र. १९.५८-६८ ) विस्तृत, पसरलेले.

**पञ्चन्**–वि., **सङ्ख्या० दशार्धम्** ( चसू. २७.२८ ) पाच. दहाचा अर्ध.

( **पञ्च** )–**कर्मन्**–न., **चिकित्सोपायः, वमन-विरेक-नस्य-निरूहानुवासनानि** ( चसू. २८.२७; अहृसू. २७.८ ) **निरूहवमनकायविरेकशिरोविरेकास्रविस्रुतय इति पञ्च कर्माणि** (अहृसू. १४.५ ) **केचन स्नेहनस्वेदन-वमनविरेचनबस्तीन् पञ्चकर्माण्याहुः, स्नेहनस्वेदने वमनादीनां पूर्वकर्मणी** ( र. १८.१९५ )
पंच कर्मे. उपचार. वामक रेचक, नाकात औषध, निरूहबस्ति, स्नेहबस्ति देणे. दुसरे मत–निरूह बस्ति, वामक, रेचक, नाकात औषध व रक्तस्राव ही पंच कर्मे. अन्य मत–स्नेह देणे, घाम काढणे, वांती व रेच करणे व बस्ति देणे ही पंच कर्मे.

–**कर्मगुणातीत**–वि., **लक्षण० संशोधनसंशमनाभ्यङ्गगुग्गुलुशिलाजतुप्रभृतीनि, तेषां फलेभ्योऽतीतम्, नात्र वमनादिपञ्चकर्म कथमपि सम्बध्यते** ( सुसू. ३३.९ ) संशोधन, संशमन, अभ्यंग, गुग्गुळ, शिलाजतु इत्यादिकांच्या फलापेक्षा पलीकडचे. वमनादि पंच कर्म नव्हे.

–**कर्मीयसिद्धि**–स्त्री., (परिव०) **अध्याय०** (चसि. २) अध्यायाचे नाव. पंचकर्मांच्या सिध्दीची माहिती यात आहे.

–**कापित्थघृत**–न., **घृत० कपित्थफलमूलपुष्पत्वक्पत्र-कल्ककषायसिद्धं घृतम्, सर्वमूषिकविषहरमिदम्** ( सुक. ७.४०; असंउ. ४६ )
कवठाचे तूप. कवठाचे फळ, मूळ, फूल, साल, पाने यांची चटणी व काढा यांनी तयार केलेले तूप. सर्व जातींच्या उंदरांच्या विषावर उपयुक्त.

–**कृत्**–पु., **वनस्पति० पक्काण्डः** ( रापरि. ८.१६ ) जीर्णज्वरनाशक एक वनस्पती.

–**कृत्वः**–**अव्य० पञ्चवारम्** ( सुशा. ९.११ ) पाच वेळा.

–**कृष्ण**–पु., **कीट० सविषोऽयम्, तथा सौम्यः श्लेष्मप्रकोपणश्च, एतेन दष्टे सति कफविकारा भवन्ति** ( सुक. ८.१२-१५; असंउ. ४३ )
एक विषारी किडा. सौम्य व कफप्रकोपी. हा डसल्यावर कफविकार होतात.

–**कोलक**–न., **शुण्ठी–पिप्पली–पिप्पलीमूल–चव्य–चित्रकाणि च पञ्चकोलमुच्यते ।**
**तद्गुणाः –कटु दीपनमुष्णवीर्यं कोष्ठगतवातनाशनं पाचनं रुच्यं त्रिदोषघ्नं स्वरभेदशूलगुल्मघ्नं च ।** ( र. १३.९१ ) (ध. ७.१३; अहृसू. ६.१६६)

**'पिप्पली पिप्पलीमूलं चव्यचित्रकनागरम् ।**
**एकत्र मिश्रितैरेभिः पञ्चकोलकमुच्यते ॥ '**
सुंठ, पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, हे पंचकोल. **गुण**–तिखट उष्ण अग्निदीपक कोष्ठगत वातनाशक, पाचक, रुचकर त्रिदोषघ्न, स्वर फुटणे, शूळ व गुल्मनाशक.

**–कोलघृत**–न., घृत० **पिप्पलीपिप्पलीमूलचव्यादिसिद्धम् घृतम् इदं श्वयथुवातविष्टम्भगुल्मार्शोजठरामयनाशनम्, रूक्षाणां बहुवातानां संशोधनार्थिनामुपयोज्यम्** ( चचि. १३.११२-११४ )
पंचकोलघृत. पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ, यांनी सिद्ध तूप. सूज, वात, अवष्टंभ, गुल्म, अर्श, उदर नाशक. रूक्ष, पुष्कळ वात असलेले रोगी व शोधनकार्य करावयास योग्य अशा लोकांना उपयुक्त.

**–खर्पर**–न., **तुत्थखर्परम्, तुत्थकम्, किट्टतुल्यतुत्थखण्डः** ( र. २.१३४ )
मोरचूद. किट्टासारखा मोरचुदाचा तुकडा.

**–गङ्ग**–पु., देश० **पञ्चनदो देशः, अयमतीव सुमनोहरः** ( चचि. ४.३ )
पाच नद्यांचा देश. पंजाब देश. हा फारच मनोरम आहे.

**–गण**–पु., **पञ्चमूलानि** ( सुउ. ४८.१९ ) पाच मुळे.

**–गव्य**–न., **गोजाताः क्षीरादिकाः पञ्चपदार्थाः गोमूत्रं गोमयं क्षीरं दधि सर्पिश्च । एतद् देहशुद्धिकरं कफघ्नं च ।**
**' गोमूत्रं गोमयं क्षीरं दधि सर्पिस्तथैव च ।**
**समं योजितमेकत्र पञ्चगव्यमिति स्मृतम् ॥ '**
( ध. ७.५२ ) गाईचे मूत्र, शेण, दूध, दही, तूप, हे पंचगव्य. हे शरीरशुद्धिकर, कफनाशक.

**–गव्यघृत**–न., घृत० **कामलापाण्डुरोगघ्नम्** ( चचि. १६.४३ )
गाईचे शेण, मूत्र, दूध, दही, तूप, यांनी तयार केलेले तूप. कावीळ, पांडुरोगनाशक.
**अपस्मारकामलाज्वरनाशनम्** ( चचि. १०.१७ )
अपस्मार, कावीळ, तापनाशक.
**जीर्णज्वरशोफपाण्डुरोगेषु प्रशस्तम्** ( सुउ. ३९.२४२ )
जीर्णज्वर, सूज, पांडुरोग यांवर प्रशस्त.
**श्वयथावुपयुज्यते** ( असंचि. १९ ) सुजेवर योजतात.

**–गव्यसर्पिस्**–न., घृत० **अपस्मारभूतचातुर्थकक्षयश्वासोन्मादनाशनम्** ( सुउ. ६१.३४-३७ )
पंचगव्याने तयार केलेले तूप. उन्माद, अपस्मार, भूतबाधा, चातुर्थिक ज्वर, क्षय, श्वासनाशक.
**पाण्ड्वामयघ्नमिदम्** ( असंचि. १८ )
पांडुरोगनाशक.
**विषमज्वरे बलार्थमुपयुक्तम्** ( काखिल. १.७८ )
विषम ज्वरात शक्ति वाढण्याकरिता उपयुक्त.

**–गुप्ति**–स्त्री., **वनस्पति० स्पृक्का** ( रा. १२.११४ )
पिंडका, एक सुगंधि गवत.

**–जन**–पु., **मनुष्यः, पञ्चभिर्भूतैर्जन्यत इति पञ्चजनः पुरुषः** ( का. उदावर्त. चि. )
पाचापासून झालेला. पाच महाभूतांपासून झालेला. मनुष्य.

**–ता**–स्त्री., **पञ्चानां क्षित्यादिभूतानां भावः पञ्चता पञ्चत्वमिति यावत्, मृत्युः, पञ्चत्वगमनम्** ( सुसू. २८.३ ) पंचमहाभूतत्व. मृत्यु.

**–तिक्त**–वि., **तिक्तपञ्चकयुतं निरूहादि, पटोलनिम्बभूनिम्बरास्नासप्तच्छदानि पञ्चतिक्तानि** ( चसि. ८.९ )
पाच कडू द्रव्ये. पडवळ, निंब, काडेचिराईत, रास्ना, सप्तपर्णी. ही पाच कडू द्रव्ये.

**–त्व**–न., **मृत्युः** ( चशा. १.७४ )
मृत्यु. पंचमहाभूतत्व.

**–त्वग्रहण**–न., **मरणज्ञानम्** ( चशा. १.७१ )
मरणज्ञान.

**–त्वप्रत्यय**–पु., **मृत्युहेतुः, क्षयादिव्याधिः** ( चचि. ३.१३ )
मृत्यूचे कारण. क्षय इत्यादी रोग.

**–नखराज**–पु., **प्राणि० गोधा** ( धपरि. ६.३९ )
घोरपड.

**–निम्ब**–न., **निम्बस्य पञ्चाङ्गम्, निम्बस्य पत्रत्वक्पुष्पफलमूलानि। पञ्चनिम्बगुणाः–कुष्ठपञ्चकघ्नं व्रणनाशनं च** ( ध. ७.५४ )
कडुनिंबाचे पंचांग. पाने, साल, फुले, फळे, मूळ. **गुण**– पाच कुष्ठे व व्रणनाशक.

**–पटु**–न., **पञ्चलवणानि, सैन्धवसौवर्चलबिडसामुद्रौद्भिदानि** ( र. १२.६९ )
पाच मिठे. सैंधव, पादेलोण, बिडलोण, समुद्रमीठ व जमिनीतले मीठ.

**-पर्णिका**-स्त्री., वनस्पति० गोरक्षी ( रापरि. ५.३० )
सर्पासारखी पण लांब दांडी असलेली फार वास असलेली पाच पानांची वनस्पती.

**-पित्तक**-न., पित्तपञ्चकम्, नागाश्वशिखिगोमत्स्यपित्तैः स्यात् पञ्चपित्तकम्। पित्तं पञ्चविधं मात्स्यगवाश्वरुरुबर्हिजम्। वाराहच्छागमाहिषमात्स्यमायूरपित्तजम् ( र. १२.१२२ )
पाच पित्ते. पित्तपंचक. हत्ती, घोडा, मोर, मासा व गाय यांचे पित्त. मासा, गाय, घोडा, मोर, हरिण यांचे पित्त पित्तपंचक. डुक्कर, शेळी, म्हैस, मासा व मोर यांचे पित्त असे पित्तपंचक.

**-भूत**-न., भूतपञ्चकम्, पृथ्व्यप्तेजोवाय्वाकाशानि ( अहृसू. ९.१ )
पाच भूते. पृथ्वी, जल, अग्नि, वायू, आकाश.

**-भूतप्रसादजा**-वि., पृथिव्यादिपञ्चमहाभूतानां प्रसन्नांशैर्निर्मिता दृष्ट्यादिः ( सुउ. ७.३ )
पंचमहाभूतांच्या प्रसादरूप अंशांनी दृष्टि इत्यादी इंद्रियांची उत्पत्ति झाली म्हणून दृष्टि इत्यादी इंद्रिये पंचभूतप्रसादज होत.

**-भृङ्ग**-न., देवदाली-शमी-भृङ्गा-निर्गुण्डी-सनकाः, रोगोपशमे जाते रुग्णस्य स्नानार्थं पानार्थं चोपयुज्यन्ते ( ध. ७.१७ )
पाच भृंगे—देवडांगरी, शमी, माका, निर्गुंडी, व सनक. रोग गेल्यावर स्नानाकरिता व पिण्याकरिता यांचा उपयोग होतो.

**-महाभूतशरीरिसमवाय**-पु., आकाशादिपञ्चभूतानामात्मनश्च संयोगः ( सुशा. १.१६ )
आकाश इत्यादी पाच महाभूते व आत्मा यांचा संयोग.

**-माहिष**-न., माहिषपञ्चकम् महिष्या दुग्धं दधि घृतं मूत्रं मलश्च ( र. २.३३ )
म्हशीचे दूध, दही, तूप, मूत्र व शेण हे पंचक.

**-मुखच्छिद्रा**-वि., मुखे छिद्रपञ्चकयुता ( नाड्यादिः ) ( अहृसू. २५.१३ )
तोंडाला पाच च्छिद्रे असलेली नळी इत्यादी.

**-मुखी**-स्त्री., वनस्पति० आटरूषः ( रा. ४.२९ )
अडुळसा.

**-मुष्टि**-स्त्री., वनस्पति० स्पृक्का ( ध. ३.६२ )
पिंडका. एक सुगंधी गवत.

**-मूल**-न., मूलानां पञ्चकम् ( चचि. १.४१ )
पंचमूल, मूळपंचक, महल्लघुभेदेन तद् द्विविधम्, तत्र महत्–बिल्वाग्निमन्थश्योनाककाश्मर्यपाटलाः। एतद् सतिक्तं मधुरानुरसं पाके लघ्वग्निदीपनं कफवातघ्नं च ( चसि. ३.१३; सुसू. ३८.६८-६९; ध. ७.२१ ) लघुपञ्चमूलम्–शालिपर्णी पृश्निपर्णी बृहती कण्टकारिका गोक्षुरश्च। तद्गुणाः–कषायतिक्तमधुरं बृंहणं बलवर्धनं वातपित्तशमनं त्रिदोषघ्नम् (सुसू. ३८.६६-६७) ज्वरकासश्वासशूलाग्निमान्द्यारुचिघ्नं च ( ध. ७.१९ )
सङ्ख्यया पञ्चमूलानि पञ्च, विदारिगन्धादि, बिल्वादि, पुनर्नवादि, जीवकादि, शरादि च
( चचि. १.४२-४५ ) सुश्रुतगतानि पञ्च पञ्चमूलानि त्रिकण्टकादि बिल्वादि विदार्यादि करमर्दादि कुशादि च। तत्र त्रिकण्टकादि–त्रिकण्टकबृहतीद्वयपृथक्पर्ण्यो विदारिगन्धा च कनीयः। बिल्वादि–बिल्वाग्निमन्थटिण्टुकपाटलाः काश्मर्यश्चेति महत्। विदार्यादि–विदारीसारिवारजनीगुडूच्योऽजश्रृङ्गी चेति वल्लीसंज्ञम्। करमर्दादि–करमर्दत्रिकण्टकसैरीयकशतावरीगृध्रनख्यश्चेति कण्टकसंज्ञम्। कुशादि–कुशकाशनलदर्भकाण्डेक्षुकाश्चेति तृणसंज्ञम् तत्र–आद्यौ त्रिकण्टकादिबिल्वादी वातहरौ, मध्यौ वल्लीकण्टकसंज्ञौ श्लेष्मशमनौ, अन्त्यश्च तृणसंज्ञः पित्तनाशनः ( सुसू. ३८.६६-७८ )
पंचमूळ. लहान व मोठे असे दोन प्रकारचे. **मोठे पंचमूळ**–बेल, अरणी, टेंटु, शिवण, व पाडळ. हे कडवट मागाहून गोड पचनानंतर हलके अग्निदीपक कफवातनाशक. **लहान पंचमूळ**-सालवण, पिठवण, डोरली, रिंगणी, व गोखरू. हे तुरट, कडु, गोड, पौष्टिक, बलवर्धक, त्रिदोषशामक, विशेषतः वातपित्तशामक. ज्वर, श्वास, खोकला, शूल, अग्निमांद्य, अरुचि नाशक. पंचमुळे पांच आहेत. १ बेल इत्यादी ( मोठे ) २ सालवण इत्यादी ( लहान ) ३ पुनर्नवा इत्यादी ( मध्यम ) ४ जीवक इत्यादी ( जीवन पंचमुळे ) ५ बाणगवत इत्यादी (गवती). सुश्रुतात पाच पंचमूळांपैकी मोठे लहान व गवती पंचमुळे वरच्या सारखी आहेत पण भुईकोहळा इत्यादी व करवंद इत्यादी पंचमुळे निराळी आहेत. भुईकोहळा इत्यादीना वेलीपंचमुळे व करवंद इत्यादींना कांटेरी पंचमुळे म्हणावे. ही कफनाशक आहेत. **वेलीपंचमुळे**-भुईकोहळा, अनंतमूळ, हळद, गुळवेल, मेढशिंगी, व **कांटेरी पंचमुळे**–करवंद,

गोखरू, कोन्हांटी, शतावरी, व रानबोर. पहिली दोन पंचमुळे वातहर व गवती पित्तनाशक.

**–मूलक–न., पञ्चमूलम्** ( सुसू. ३८.६७ ) पंचमूळ.

**–मूलकपञ्चक–**न., **पञ्चमूलानां पञ्चकम्, बिल्वादि पुनर्नवादि जीवकादि शरादि गन्धादि च । तत्र बिल्वादिचतुष्टयं सर्वत्र चरकसुश्रुतादिषु समानम्। भिन्नं तु पञ्चमम्, गन्धादि–गन्धहर्षदंष्ट्रा सौरभ्य-करमर्दिकानां मूलानि** ( ध. ७.७४ )
पाच पंचमुळे. पंचमुळांचे पंचक. १ बेल इत्यादी २ पुनर्नवा इत्यादी २ जीवक इत्यादी ३ बाण गवत इत्यादी व गंध इत्यादी. बेल इत्यादी पंचमुळांची चौकडी चरक सुश्रुतात सारखी आहे पण गंधादी निराळी आहेत, ती व्रीही तांदूळ, गेळफळ गोखरू कोथिंबीर करवंद. पहा 'पंचमूल.'

**–मूली–**स्त्री., **कनीयः पञ्चमूलम्** ( चचि. ३.२३४ ) लहान पंचमुळे.

**–रक्षक–**पु., **वनस्पति० पक्वाण्डः** ( रापरि. ८.१६) एक वनस्पती.

**–राजीफल–**पु., **वनस्पति० पटोलम्** ( रा. ३.७४ ) पडवळ.

**–रात्र–**न., **रात्रिपञ्चकम्** ( चसू. ५.१५ ) पाच रात्री.

**–लवण–**न., **लवणपञ्चकम्–काच-सैन्धव-सामुद्र-बिड-सौवर्चलात्मकम्** ( र. ५.२१९ )
पाच मिठे. काचलवण, सैंधव, समुद्रमीठ, बिडलोण, पादेलोण.

**सैन्धव-सौवर्चल-बिड-रोमक-सामुद्रात्मकम्**
( र. ४.६७ ) सैंधव पादेलोण बिडलोण जमिनीतील एक मीठ व समुद्राचे.

**–लोह–**न., **खनिज० वर्तलोहम्** ( ध. ६.३३; ( र. ५.२२० )
पाच धातु, पंचधातु. कासे, तांबे, पितळ, लोखंड व शिसे मिळून भट्टर.

**–वक्त्र–**पु., **योग० पारदगन्धक–वत्सनाभ–मरिच–टंकणयुक्तः**
**सन्निपातज्वरघ्नः कफघ्नोऽग्निदीपनश्च**
( र. १२.११२-१३ )
एक योग. पारा, गंधक, बचनाग. मिरी व टांकण-खार युक्त. हा योग सन्निपात ज्वर, व कफनाशक असून अग्निदीपक आहे.

**–वर्ग–**पु., **अक्षराणां कचटतपानां कचटतपवर्गीयाणा-मन्येषां च समुदायः** ( चवि. ८.५४ )
पाच वर्ग. कवर्ग, चवर्ग, इत्यादी पवर्गासह पाचवर्ग. कचटतप या अक्षरांचा गट.

**आनूपपञ्चवर्गे कूलचराः प्लवाः कोषस्थाः पादिनो मत्स्याश्चेति पञ्चवर्गः** ( सुचि. ५.१८ )
आनूप–झाडे व पाणी विपुल असलेल्या भागातील पंचवर्ग. यात पाण्याच्या काठावर रहाणारे, पोहणारे शंखासारखे कोशात रहाणारे पाय असलेले व मासे यांचा समावेश होतो.

**–वर्धन–**पु., **वनस्पति० पक्वाण्डः** ( रापरि. ८.१६ ) एक वनस्पती.

**–वल्क–**न., **पञ्चवल्कलम्** ( चचि. १४.२१४ ) पाच वृक्षांच्या साली.

**–वल्कल–**न., **पञ्चक्षीरिवृक्षाणां न्यग्रोधोदुम्बराश्वत्थ-पारीषप्लक्षाणां त्वक्, स्राविण्यर्शसि परिषेचने उपयुज्यते** ( चचि. १४.२१४ ) **न्यग्रोधोदुम्बरा-श्वत्थप्लक्षवेतसवल्कलैः सर्वैरेकत्र संयुक्तैः पञ्चवल्कल-मुच्यते। तद्गुणाः–कषायं शीतं वर्ण्यं कफघ्नं दाहतृष्णायोनिदोषशोफघ्नं च** ( चचि. २१.९४; ध. ७.१५ ) **सल्लकीझिंझिणीजम्बूधवशाल्म-लिकात्वचः** । (इन्दु.) **शिरीषपिप्पलवटप्लक्षवेतसत्वक्** (अरु.)**मण्डलिसर्पविषे लेपार्थमुपयुज्यते** (असंउ.४२)
पाच दुधाळ झाडांच्या साली–वड, उंबर, पिंपळ, पारोसा पिंपळ, पिंपरी, रक्तस्राव होत असलेल्या मूळव्याधीत शिंपडण्याकरिता उपयुक्त.

वड, उंबर, पिंपळ, पिंपरी, व वेत यांची साल एकत्र घेणे. ह्या साली म्हणजे पंचवल्कल. **गुण**—तुरट, थंड, वर्ण चांगला करणाऱ्या, कफनाशक, दाह, तहान, योनिरोग, व सूज नाशक.

साळई, झिंझिणी, जांभूळ, धावडा, सावर यांच्या साली. सिरस, पिंपळ, वड, पिंपरी, व वेत यांच्या साली. मंडली सर्पदंशावर लेपाकरिता उपयुक्त.

**–शिरीष–**पु., **योग० शिरीषवृक्षस्य फलमूलत्वक्-पुष्पपत्रैः कृतः सर्वविषप्रशमनः** ( चचि. २३.२१८) **विशेषतः कीटविषघ्नः** (सुक. ५.८१)
सिरसाचे फळ, मूळ, साल, फूल, पान, ही शिरस पंचक. सर्व विषनाशक विशेषतः किड्याचे विष नाशक, सिरसपंचांग.

**–शुक्ल**–पु., कीट० **सविषोऽयम्, असौ सौम्यः कफविकारांश्च करोति** ( सुक. ८.१२; असंउ. ४३ )
एक विषारी किडा. हा सौम्य, कफविकार करतो.

**–शैरीष**–न., **शिरीषस्येदमिति शैरीषं, शिरीषवृक्षपञ्चाङ्गम्, विषघ्नमिदम्** ( ध. ५.५७ ) **कीटविषघ्नमिदम्** ( रा. २२.२७ )
सिरसाच्या झाडाचे मूळ, साल, पान. फूल व फळ असे पंचांग. सिरस पंचांग. हे किड्यांचे विषनाशक.

**–सार**–पु., **मधुखर्जूरमृद्वीकापरूषकसिताम्भसा कृतः रक्तपित्तप्रशमनः** ( असंचि. ३ )
पंचसार. सार पंचक. सार पंचकडी. मध, खजूर, द्राक्ष, फालसा, खडीसाखर यांनी केलेले, रक्तपित्त नाशक.
न., आहारद्रव्य० **द्राक्षामधूकखर्जूरकाश्मर्यैः सपरूषकैः तुल्यांशैः कल्पितं पूतं शीतं कर्पूरवासितं पञ्चसाराख्यं दाहतृष्णानिवर्तकं पेयम्। वसन्ततौं पानोपयोगि** ( अहसू. ३.३१ )
आहारातले द्रव्य. द्राक्षे, मोहाची फुले, खजूर, शिवण व फालसा ही समभाग घेऊन कपड्यातून गाळून कापराचा वास लावून तयार झालेले सारपंचक दाह, तहान नाहीसे करते. हे पेय वसंतऋतूत पिण्यास उपयोगी.
**क्वथितं दुग्धं शर्करा पिप्पल्यो मधु सर्पिश्च इत्येषां समभागोपयोगेन कृतम्। विषमज्वर-क्षतक्षीणक्षय-श्वास-हृद्रोगादिषु शस्यते** ( सुउ.३९.२५४-२५५ )
कढवलेल्या दुधात साखर, पिंपळी, मध, तूप ही समभाग घालून केलेले पंचसार, विषमज्वर उरःक्षताने क्षीण रोगी व क्षय श्वास हृद्रोग इत्यादींमध्ये योग्य.

**–सिद्धौषधिक**–न., **सिद्धौषधिपञ्चकम्, कन्दपञ्चकम्- तैलकन्दः सुधाकन्दः क्रोडकन्दो रुदन्तिका सर्पनेत्रञ्चेति पञ्चसिद्धौषधिकम्** ( ध. ७.६१ )
विशिष्ट पाच कंद, कंदपंचक. तेलियाकंद, सुधाकंद, डुक्करकंद, रुदंतिका. पांढरे विषारी आलू हे पाच सिद्धौषधि कंदपंचक.

**–सूरण**–न., योग० **अत्यम्लपर्णी-काण्डीर-मालाकन्द-द्विसूरणैर्युक्तम्** ( ध. ७.६० )
पाच सुरण. सुरण पंचक. अत्यम्लपर्णी, कांडीर, मालाकंद व दोन सुरण. (खाजरासुरण व गोडासुरण)

**पञ्चम**–पु., स्वर० **सप्तस्वरेष्वेकः, कोकिलस्वरः** ( र. २७.५८ ) सात स्वरांपैकी एक, कोकिळेचा.

**( पञ्चमी )**–स्त्री., तिथि० **बालोत्पत्तेः पञ्चमे दिने दुःसहनामानं गजेन्द्रं पूजयेत्। येन व्रणगण्डादिरूपा पीडा बालानां न भवति** ( का. द्विव्रणीय चि. )
पाचवी. बाळाच्या जन्माच्या पाचव्या दिवशी दुःसह नावाच्या श्रेष्ठ हत्तीची पूजा करावी. याने व्रण, गण्ड इत्यादी विकार होत नाहीत.

**पञ्चल**–पु., वनस्पति० **कोलकन्द** ( रापरि. ७.३८ )
कोलकंद-धाप्याचा कांदा, कोचिंदा.

**पञ्चाङ्ग**–न., **अङ्गपञ्चकम् मूलत्वक्पत्रपुष्पफलमिति वृक्षाणां पञ्चाङ्गम्** ( चचि. २३.७८; ध. ७.५८ )
**मूलकाण्डफलपुष्पपत्राणि** (र. १९.९३; र.३०.४३)
**मूलकाण्डशाखापत्रपुष्पाणि** (र. २०.८१) **पत्रपुष्पफलनालकन्दः** ( र. २०.८१ )
पंचांग. अंग पंचक. मूळ, साल, पान, फूल, व फळ, वनस्पतीचे पंचांग.
मूळ, कांडे, फळ, फूल, व पान. हे पंचांग.
मूळ, कांडे, खांदी, पान, फूल हे पंचांग.
पान, फूल, फळ, नाळ, व कंद हे पंचांग.

**( पञ्चाङ्गी )**–स्त्री., व्रणबन्ध० **चतुर्दशबन्धेष्वेकः अयं जत्रुण ऊर्ध्वं विधीयते। तत्स्वरूपम्–अस्मिन् व्रणबन्धविशेषे पट्टे चत्वारो बाह्व एका चोर्ध्वे पट्टिका** ( सुसू. १८.१७ )
व्रण बांधावयाच्या चवदा पट्ट्यांपैकी एका बंधाची–पट्ट्याची संज्ञा. हा खांद्याच्या वर बांधण्यास उपयुक्त. ज्यात वर एक पट्टा व खाली चार निरनिराळे पट्टे त्याला जोडलेले असतात तो बंध.
**अयं हनुसन्धिभङ्गादौ प्रयुज्यते** ( असंउ. ३२; असंसू. ३८.४२ )
हनुवटीचा सांधा निखळला किंवा व्रण झाला तर योजतात.
**वर्तिः पञ्चभिरङ्गभूतैर्द्रव्यैः कृता वर्तिः, मुखरोगे धूमपानार्थमुपयुक्ता** ( सुचि. २२.५५ )
अंगभूत पाच द्रव्यांनी केलेली वात. मुखरोगात धूम्रपानाकरिता उपयुक्त.

**पञ्चाङ्गिक**–वि., **पञ्चसङ्ख्याकः (द्रव्यगण)** (सुउ. ४८.१९)
पाच अंगे असलेला. पाच द्रव्यांचा गण.

**पञ्चाङ्गुल**–पु., वनस्पति० **चित्रैरण्डः** ( चसू. २७.१०९ )
एक एरंड.
**पत्रशाकः एरण्डः, शाकमस्य वातलं कटुतिक्ताम्लमधोमार्गप्रवर्तनं च** ( चसू. २७.१०९ )

पानांचीभाजी. एरंडाच्या पानांची भाजी. ही वातूळ, तिखट, कडु, आंबट, मळवात, मूत्र, यांची खालच्या मार्गाने प्रवृत्ति करणारी.

**वनस्पति० एरण्डः** ( ध. १.२९५; र. १२.७४ ) एरंड.

**( पञ्चाङ्गुली )**–स्त्री.. **वनस्पति० तक्राह्वा** ( रापरि. ४.२९ ) तक्र नावाची वनस्पती.

**पञ्चाङ्गुलतैल**–न., **स्नेह० एरण्डतैलम्, वातजतिमिरे विरेचनोपयोगि** ( सुउ. १७.२९ ) एरंड तेल. वातज तिमिर दृष्टिरोगात रेचक म्हणून चांगले.

**पञ्चाङ्गुष्ठक**–पु., **वनस्पति० एरण्डः** (र. ११.९४) एरंड.

**पञ्चाज**–न., **अजाया इदमिति आजम्, अजानां, दुग्ध-दधि-घृत-मूत्र-पुरीषाणां मेलनम्** (र. २.३३ ) अजेचे-शेळीचे पाच पदार्थ. दूध, दही, तूप, मूत व मळ यांचे मिश्रण.

**पञ्चात्मक**–वि., **पञ्चमहाभूतमयं पाञ्चभौतिकम्** ( चसू. २६.१०९ ) पंचमहाभूतयुक्त.

**पञ्चानन**–पु., **योग० पाण्डुरोगराजयक्ष्मोदरहलीमकवातरोगमलावरोधकुष्ठग्रहणीज्वरातिसारश्वासकासकफरोगगलरोगार्शोऽग्निमान्द्यगुल्मनाशनः** (र. १९.६५ ) एक औषधियोग. पांडुरोग, उदर, हलीमक, क्षय, कफरोग, वातरोग, मलावरोध, कुष्ठ, ग्रहणी, ज्वर, अतिसार, श्वास, खोकला, गळ्याचे रोग, मूळव्याध, अग्निमांद्य व गुल्म नाशक.

**पञ्चामृत**–पु., **योग० व्याधिवार्धक्यनाशनः** (र. ३०.८९) एक योग. रोग व म्हातारपण नाशक.

**राजयक्ष्मादिरोगनाशनः** ( र. १४.३१ ) क्षय इत्यादी रोगनाशक.

न., **योग० इदं दीपनं पाचनं बालरोगनाशनं च** ( र. २२.१५६ ) हा योग दीपक, पाचक, बालरोगनाशक.

**गव्यमाज्यं दधि दुग्धं मधु शर्करा चैकत्रीकृतं पञ्चामृतमिति प्रकीर्त्यते। इदमजीर्णभूतबाधानाशनम्** ( ध. ७.५१ ) पंचामृत. गाईचे तूप, दही, दूध, मध, साखर ही एकत्र केलेले. हे अजीर्ण व भूतबाधानाशक.

**पञ्चामृतपर्पटी**–स्त्री., **योग० सुवर्णरौप्यताम्राभ्रककान्तलोहाद्युक्ता क्षयश्वासादिनाशिनी** ( र. १४.९७ ) पंचामृतपर्पटी. सोने, रुपे, तांबे, अभ्रक, व कांत. लोह यांची भस्मे पारा गंधक घालून केलेली पापडी.

**पञ्चाम्ल**–न., **अम्लपञ्चकम्, कोलाम्लं चुक्रिकाम्लं मातुलुङ्गमम्लवेतसं दाडिमं च** ( चचि. २२.३५ ) अम्लपंचक. बोर, चुका, महाळुंग, अम्लवेतस, व डाळिंब.

**पञ्चाम्लक**–न., **बदर–दाडिम–चिञ्चा–चुल्लिकाचुक्राणां च अम्लरसानां पञ्चकम्** ( र. १०.८३ ) बोर, डाळिंब, चिंच, लोणिका ( आंबोती ) व चाकवत.

**कोलदाडिमवृक्षाम्लचुक्रिकाऽम्लवेतसाः इति पञ्चाम्लकम्** ( ध. ७.५७ ) बोर, डाळिंब, अमसूल, आंबटचुका, अम्लवेतस, अम्लपंचक.

**–पञ्चाल**–पु., **कीट० पञ्चालकः** ( असंउ. ४३ ) एक किडा.

**पञ्चाम्लक**–पु., **कीट० सविषोऽसौ अनेनाग्निप्रकृतिकेन दष्टे सति पित्तजा रोगा भवन्ति** ( सुक. ८.१० ) विषारी किडा. हा पित्तप्रकृतीचा किडा डसल्याने पित्तज रोग होतात.

**पञ्चाम्लक्षेत्र**–न., **देश० कान्यकुब्जः** ( चवि. ३.३ ) रोहिलखंड व कनोज यांच्या दक्षिणेकडचा भाग.

**पञ्चेन्द्रिय**–वि., **पञ्चेन्द्रियाणि यस्य सः** ( सुशा. ९.११ ) पाच इंद्रिये असलेला (पुरुष).

**पञ्चेन्द्रियग्रहण**–न., **पञ्चभिर्ज्ञानेन्द्रियैर्ज्ञानम्** (सुसू. ४०.३) पाच ज्ञानेंद्रियानी ग्रहण केलेले ज्ञान.

**पञ्चेन्द्रियार्थविप्रतिपत्ति**–स्त्री., **अध्याय० पञ्चेन्द्रियार्थानां शब्दादीनां विपरीतावबोधमधिकृत्य कृतः सुश्रुतस्थानगतस्त्रिंशत्तमः** ( सुसू. ३० ) अध्यायाचे नाव. यात इंद्रियांचे शब्दादि अर्थांच्या विपरीत असे ज्ञान हा विषय सांगितला आहे.

**पटचूर्ण**–न., **वस्त्रगालितचूर्णम्** ( र. १५.२२ ) वस्त्रगाळ चूर्ण.

**पटल**–न., **शारीर० त्वक्सदृशस्तनुभागः** ( सुउ. १.१४ ) त्वचेसारखा अगदी पातळ पडदा.

**नेत्ररोग० लिङ्गनाशः** (चचि. २३.७३; असंउ. १७) दृष्टिनाश.

**–हर**–न., **अञ्जन० इदं पटलरोगनाशनम्** (र. २३.५५) एक अंजन, डोळ्याच्या पडद्याच्या रोगांचे नाशक.

**पटह**–पु., **वाद्योऽयं दुन्दुभिः, महागन्धहस्तिनामकागदलिप्तपटहवादनेन विषार्तस्य विषं नश्यति** ( चचि. २३.८७ )

एक वाद्य. दुंदुभि. नगारा. महागंधहस्ती नावाच्या विषनाशक योगाचा लेप लावलेला नगारा. हा वाजवल्याने हवेतील विषाची बाधा नष्ट होते.

**पटालिका**–स्त्री., **पटानां वस्त्राणां आलिः पंक्तिः पटालिः पङ्क्तिमती नवा तृणादिरचिता भित्तिः । वस्त्रनिर्मितं गृहम्** ( अरु. अहसू. ३.३४ )
पटाच्या-कपड्यांच्या रांगांनी बनविलेले घर. पडदे लावलेली जागा.

**पटु**–वि., **प्रवीणः, वक्ता** ( ड. सुक. १.१० )
प्रवीण. कुशल वक्ता.
पु., **वनस्पति० काण्डीरः** ( ध. ४. ६२ ) कांडवेल.
**चोरकः** ( रा. १२.१२७ ) चोरओवा.
**निर्यास० कर्पूरभेदः** ( ध. ४.६२ ) कापराचा प्रकार.
न., **लवण० सैन्धवम्** ( अहसू. १९.४१ ) सैंधव.

**–क्षीरा**–वि., **लवणं क्षीरं यस्याः सा** ( **धात्री** ) ( का. फक्कचि. ) जिचे दूध खारट आहे ती ( दाई )

**–तृणक**–न., **वनस्पति० लवणतृणम्** ( रापरि. ८.५७ ) खारट गवत.

**–पञ्चक**–न., **लवणपञ्चकम् ,सैन्धवसौवर्चलबिडसामुद्रौद्भिदानि पञ्च पटूनि लवणानि** ( र. १६.१५५ )
पाच मिठे. सैंधव, पादेलोण, बिडलोण, समुद्रमीठ व जमिनीतून निघणारे मीठ.

**–प्रजा**–वि., **कुशलाधिकप्रबलप्रजा** ( काफक्कचि. )
कुशल व अधिक बलवान प्रजा.

**पटोल**–न., **वनस्पति० तृप्तिघ्नगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.११ (११) ) **तृष्णानिग्रहणगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१४ ) **उद्वर्तनेन कण्ड्वादिहरम्** ( चसू. ३.८ ) **अस्य फलपत्रे शाकत्वेनोपयुज्येते** ( सुसू. ४६.२६८ ) **नेत्ररोगे एतन्मुकुलान्याश्च्योतनोपयोगीनि** ( असंउ. १४ ) **मधुरतिक्तभेदेनेदं द्विधा। आद्यं स्वादु कृमिनुद् रुचिकरं हृद्यं च। द्वितीयं कटु तिक्तमुष्णं कटुपाकि** ( ध. ) **वृष्यं व्रण्यमवातलं** ( सु. ) **ग्राहि वातलं रुचिप्रदं** ( अस. ) **पित्तकफघ्नं रक्तकण्डूकुष्ठज्वरदाहनाशनं च** ( चसू. २७.९६ ; ध. १. ४९ )
हिं.—परवल.
**म.—पडवळ.**
गु.—परवल.
बं.—चिचिण्डा.
त. —पुटोल्.
आ. को. म. १०३

पडवळ. दोन प्रकार. गोड व कडु. १ **गोड पडवळ**–गोड, रुचकर, हृदयाला हितकर, व कृमिनाशक. २ **कडु पडवळ**–कडु, तिखट, उष्ण, पचनानंतर तिखट, शुक्राला हितकर, व्रणाला चांगले, थोडे वातूळ, मल बांधणारे, रुचिकर, पित्तकफनाशक, रक्तदोष, खाज, कुष्ठ, दाह नाशक. तृप्तिनाशक, तृष्णानाशक गणात हे द्रव्य आहे. याचे उटणे खाज नाशक फळ व पाने यांची भाजी करतात. नेत्ररोगात कळ्या उपयोगी.

**( पटोली )**–स्त्री., **स्वादुपत्रफलं पटोलम्** ( रा. ७.७६ ) **तिक्तद्रव्यस्कन्धे पटोली श्रेष्ठा** ( असंसू. १८.२८ )
गोड पाने व फळे असलेले पडवळ. कडु द्रव्यांच्या समुदायात कडु पडवळ श्रेष्ठ.

**–घृत**–न., **घृत० रक्तपित्तप्रबलेषु कुष्ठेषूपयुक्तम्** ( चचि. ७.१३५ )
पडवळाने सिद्ध केलेले तूप. रक्त व पित्तदोष बलवान असलेल्या कुष्ठात उपयुक्त.

**–यूष**–पु., **यूष० अयं हृद्यो दीपनः पित्तघ्नः कफमेदोविशोषणः कृमिकुष्ठज्वरापहश्च** ( सुसू. ४६.३७०-३७१ )
पडवळाच्या भाजीचे पाणी. हे दीपक कफमेदशोषक पित्तनाशक कृमिकुष्ठज्वरनाशक.

**पटोलादिकषाय**–पु., **कल्प० अयं विसर्पघ्नः** ( चचि. २१.५९ )
पडवळ इत्यादिकांचा काढा. हा विसर्पनाशक आहे.

**पटोलादिगण**–पु., **द्रव्यगण० पटोलचन्दनकुचन्दनमूर्वागुडूचीपाठाः कटुरोहिणी च। अयं पित्तकफारोचकघ्नो ज्वरोपशमनो व्रण्यश्छर्दिकण्डूविषापहः** ( सुसू. ३८.३३-३४ ) **कफपित्तकुष्ठज्वरविषवम्यरोचककामलानाशनः** ( असंसू. १६.९; अहसू. १५.१५ )
पडवळ इत्यादिकांचा गण. पडवळ, चंदन, रक्तचंदन, मोरवेल, गुळवेल, पहाडमूळ आणि कुटकी मिळून हा गण पित्त कफ, बेचव, ज्वर, व्रण, ओकारी, खाज व विषनाशक. व्रणाला हितकर. कावीळनाशक.

**पटोलादिघृत**–न., **घृत० रक्तपित्तकफस्वेदक्लेदपूयाङ्गशोषणकामलाज्वरविसर्पगण्डमालानाशनम्** ( सुउ. ३९.२४६ )
पडवळ इत्यादींचे तूप. रक्तस्राव, कफ, घाम, ओलावा, पू, अंगशोष, कावीळ, ताप, धावरे, गंडमाळा नाशक.

**पटोलाद्यचूर्ण**–न., चूर्ण० सर्वोदरघ्नमेतत् ( चचि. १३.११९-१२३ )
पडवळ इत्यादींचे चूर्ण. सर्व उदरनाशक.

**पटोली**–स्त्री., वनस्पति० पटोलम् ( रा. ७.७६ )
गोड पडवळ.

**-पटोल्यादिघृत**–न., घृत० अपचीकुष्ठज्वरनेत्रवदनकर्णघ्राणजगद्गुक्रव्रणार्जुनव्रणनाशनमिदम् ( सुउ. ३९.२२६-२२९ )
पडवळ इत्यादींचे तूप. जुन्या गंडमाळा, कुष्ठ, ज्वर, डोळे, कान, नाक, यांचे रोग, डोळ्यांतील व्रण अहिरा ( कवडा ) व जखम नाशक.

**पट्ट**–पु., न., व्रणबन्धनद्रव्येष्वेकम्, वस्त्रपट्टकम् ( सुसू., ५.६; चचि. २५-९६ )
पट्टा. व्रण बांधण्यास उपयुक्त द्रव्यांतील एक द्रव्य; कपड्याचा पट्टा.

**–बन्ध**–पु., स्वेद० क्षौमकार्पासादिपट्टकैर्बन्धनम्, अयमनग्निस्वेदप्रकारः ( ड. सुचि. ४.१७ )
रेशीम, कापूस इत्यादिकांच्या पट्ट्यांनी बांधणे. हा अग्निवाचून घाम आणण्याचा प्रकार.

**–रञ्जन**–न., वनस्पति० कुचन्दनम् ( ध. ३.६ )
रक्तचंदन.

**–राग**–न., वनस्पति० कुचन्दनम् ( ध. ३.६ )
रक्तचंदन.

**पट्टक**–पु., न., पट्टिका ( सुसू. १८.३७ ) पट्टा.
काष्ठपट्टिका, चिक्कणशिला ( र. ५.२३० )
लाकडाची पट्टी. चिकण चपटा दगड.

**पट्टिकारोध्र**–पु., वनस्पति० लोध्रभेदः पट्टिकालोध्रः ( ध. ३.१७७ ) रोध्राचा प्रकार.

**पट्टिन्**–पु., वनस्पति० लोध्रभेदः, पट्टिकालोध्रः ( ध. ३.११७ ) द्र० ' लोध्र ' रोध्राचा प्रकार.

**पठन**–पु., अध्ययनं पाठः, पठनविधिः–अद्रुतमविलम्बितमविशङ्कितमननुनासिकं व्यक्ताक्षरमपीडितवर्णमक्षिभ्रुवौष्ठहस्तैरनभिनीतं सुसंस्कृतं नात्युच्चैर्नातिनीचैश्च स्वरैः पठेत् ( सुसू. ३.५४ )
अध्ययन करणे. पाठ करणे. **पाठ करण्याचा विधि**–फार घाईने नाही अगदी स्थिर नाही त्रास न घेता नाकात न बोलता स्पष्ट अक्षरांनीं अक्षर न दाबता डोळे भुवया ओठ हात यांची वेडीवाकडी हालचाल न करिता कानाला गोड लागेल असे फार जोराने नाही फार हळु नाही असे पाठ करावे—वाचावे.

**पणधा**–स्त्री., वनस्पति० पण्यन्धः ( रापरि. ८.५८ )
एक वनस्पती पणध.

**पणव**–पु., दुन्दुभिप्रकारः ( असंशा. १०.७ )
नगाऱ्याचा प्रकार.

**पणाङ्गना**–स्त्री., वेश्या ( चसि. ११.२९ ) वेश्या.

**पणिक**–पु., वणिक् ( सुचि. २४.९८; अहसू. २.४३ )
वाणी, दुकानदार.

**पण्यजीविन्**–पु., वणिक् ( चसि. ११.२७ )
व्यापारावर जगणारा, वाणी, व्यापारी. दुकानदार.

**पण्यन्ध**–पु., वनस्पति० अयं दीर्घमध्यह्रस्वभेदेन त्रिविधः, पण्यन्धगुणाः–तिक्तः क्षारः व्रणसंरोपणः सारकश्च ( रापरि. ८.५८ )
पणध वनस्पती. लांब, मध्यम, व आखूड अशी तीन प्रकारची.
**गुण**—कडु, क्षारयुक्त, व्रणरोपक आणि सारक.

**(पण्यन्धा)**–स्त्री., वनस्पति० पण्यन्धः (रापरि. ८.५८)
वनस्पती, पणध.

**पण्यविलासिनी**–स्त्री., भैषज्य० नखम् (रा. १२.१०८)
नखला.

**पतङ्ग**–पु., धान्य० शालिभेदः ( चसू. २७.९ ) द्र० ' शालि ' ( अहसू. ६.३ ) साळीचा प्रकार.
वनस्पति० जलमधूकः ( रा. ११.५९ )
ज्येष्ठमधप्रकार.

**( पतङ्गी )**–स्त्री., संस्कार० पारदघटितकल्केन लोहे जातं गौरवतेजस्वित्वादिसहितं हेमत्वं ( र. ८.५१ )
पाऱ्याच्या व इतर औषधांच्या मिश्रणाने लोखंडावर व रुप्यावर संस्कार केल्यावर त्यांच्या ठिकाणी जडपणा तेजस्विता इत्यादी सोन्याचे गुण उत्पन्न होणे.
न., वनस्पति० कुचन्दनम् ( ध. ३.६ ) रक्तचंदन.
कालीयकम् ( ध. ३.८ ) काळा अगरू.

**पतङ्गी**–स्त्री., संस्कार० ( र. ८.५१ )
पहा. '( पतङ्गी )'

**–राग**–पु., औषधिकल्केन स्वर्णादिरञ्जितस्य लोहस्य कालातिपातेन, चिरं वाऽग्नौ ध्मानेन, निर्गतः सारभागः ( र. ८.५३ )
लोखंड इत्यादी धातूंवर औषधांनी चढविलेला ( आलेला ) सोन्याचा रंग काही कालानंतर किंवा दीर्घकालानंतर किंवा अग्नीत फुंकल्यानंतर गेला तर तो पतंगीराग होय.

**पतन**–न., अनूर्ध्वस्थितिः ( सुसू. ३४.३५ ) खाली जाणे,

श्वभ्रादौ वृक्षपर्वतादेर्वा पातः ( सुनि. १५.३ )
खळग्यात किंवा झाड पर्वत इ० वरून पडणे.

गलनम् ( चसू. ५.३० ) गळणे.

**-धर्मिन्**-वि., पतनस्वभावः ( सुसू. ३२.३ )
पडण्याचा स्वभाव, पडण्याची खोड.

**पताक**-पु., सर्प० निर्विषोऽसौ ( असंउ. ४१ )
पताक नावाचा एक निर्विष साप.

**( पताका )**-स्त्री., देवगृहादिध्वजपटः ( असंसू. ८.८३ )
देऊळ इत्यादी ठिकाणी लावावयाचा कापडाचा ध्वज, निशाण.

वैजयन्ती ( इन्दु. असंउ. ५ ) जीवन्ती, अरणी.

**पतित**-वि., भ्रष्टम्, च्युतम् (सुचि. २४.९८; सुचि. २.७७)
पतित, आचारभ्रष्ट, च्युत, खालावलेला, दुष्ट.

स्वकीयधर्मात् स्वकीयाचाराद्वा भ्रष्टः
( सुचि. २४.९०,९८ )
स्वतःच्या धर्मापासून वा आचारापासून भ्रष्ट झालेला.

**-गुदवलि**-वि., लक्षण० पतिता गुदवलिर्यस्य
( चचि. १९.९ )
ज्याच्या गुदाची वळी-खाली बाहेर येते असा. गुदभ्रंश झालेला.

**-त्व**-न., लक्षण० शिरोग्रीवादीनामधार्यमाणता
( सुसू. ३२.४ )
डोके, मान इत्यादींचा तोल न सावरणे. डोके, मान सावरता न येणे.

**-शल्य**-वि., लक्षण० पाकात् स्वयं पतितं शल्यं यस्य स उत्क्षेपमर्मविद्धोऽपि पतितशल्यः सन् जीवति
( सुशा. ६.२७ )
ज्याच्या शरिरातील सलणारी वस्तु पिकल्यामुळे स्वतः आपोआप गळाली-पडली आहे असा. असे शल्य उत्क्षेप मर्मातून पडले तर तो जगतो.

**पत्तङ्ग**-न., चन्दनभेदः, रक्तचन्दनम् (चचि. २६.२१०; ( सुसू. १४.३६; असंउ. २६ ) द्र० 'चंदन'
रक्तचंदन.

पत्तूरम्, रक्तचन्दनसमं काष्ठम् ( र. ३०.६४ )
रक्तचंदनासारखे लाकूड.

**पत्तूर**-पु., वनस्पति० शालिञ्चिका (चक.चचि. २६.४६)
एक वनस्पती पाचोंदा.

शाक० शालिञ्चः ( चसू. २७.१०० ) एक वनस्पती.

वातसंशमनवर्गोक्तमेकं द्रव्यम्, कुचन्दनम्
( सुसू. ३९.७ )
रक्तचंदन, वातनाशक द्रव्यसमूहातील एक द्रव्य.

शिरवालिका, कृमिनाशिनी ( ड. सुउ. ५४.२६ )
स्वेदोपयोगिनी ( ड. सुउ. ११.५ ) प्रलेपनद्रव्येष्वेकम् ( सुचि. १९.३५ )
एक वनस्पती, कृमिनाशक आहे तसेच घाम आणण्यास व लेप करण्यास उपयोगी.

सितिवारः ( सुउ. ९.१९ ) एक वनस्पती, कुडा.

सारिवा ( जेज्जटः ) ( चचि. ३.२६७ ) अनंतमूळ.

शाक० मत्स्याक्षकः ब्राह्मीप्रकार, ( अरु. )

लोहमारः (हे.) एक वनस्पती.

पत्तूरगुणाः- दीपनस्तिक्तः कफवातजित् प्लीहार्शोघ्नः ( अहसू. ६.१००; असंसू. ७.१४९ ) स्वादुपाकरसः शीतलो नातिपित्तलो लवणानुरसः सक्षारो रूक्षो वातलः सरः कफघ्नश्च
( सुसू. ४६.२७५ )

**गुण**-अग्निदीपक, कफवातनाशक, प्लीहा, मूळव्याधनाशक, थोडे पित्तवर्धक, कडु, गोड, पचनानंतर गोड, मागाहून खारट, थंड.

**पत्र**-न., वनस्पति० पत्रकम् ( ड. सुउ. १२.१३ )
तमालपत्र.

तमालपत्रम् ( ड. सुउ. ३९.२९७; असंसू. २६.४; ध. २.५२ ) तमालपत्र.

पर्णम्, व्रणाद्युपरि बन्धनोपयोगि, तत्स्वरूपम्- अकर्कशमखरधारमत्रुटितं नवं सुकुमारकमजन्तुजग्धं मृदु च ( सुचि. १.११६ )
पान. व्रणाच्या वर बांधण्याला उपयोगी पान. त्याचे स्वरूप-खडबडीत खरखरीत नसलेले, खरखरीत कंगोरा नसलेले न तुटलेले नवे, मऊ कोवळे, कीड न लागलेले.

तालीसपत्रम् ( ध. २. ५३ ) तालीसपत्र.

**(पत्री)**-स्त्री., वनस्पति० गङ्गापत्री ( रापरि. १०.४५ )
एक वनस्पती, गंगावती.

पाची ( रापरि. १०.४६ ) पाच.

**-कन्दका**-स्त्री., वनस्पति० गन्धपलाशः (ध. १.६५)
कचोरा-प्रकार.

**-तण्डुली**-स्त्री., वनस्पति० शङ्खिनी (रा. ३,३८०)
सांखवेल.

**–तरु**–पु., **वनस्पति० खदिरभेदः, विट्खदिरः** ( रा. ८.३८ ) द्र० ' खदिर '
खैराचा प्रकार, शेण्या खैर.

**–दान**–न., **व्रणस्य षष्ट्युपक्रमेष्वेकः पत्रेण व्रणाच्छादनम्, तेन च शैत्यौष्णजननस्नेहसङ्ग्रहणे भवतः, अकर्कशाविच्छिन्नादिगुणं पत्रमुपादेयं व्रणाद्याच्छादनार्थम्** ( सुचि. १.८ )
जखमेवर पान ठेवणे. एक उपचार. याने उष्णता थंडावा उत्पन्न होणे स्नेह धरून ठेवणे ही कार्ये होतात. खरखरित नसलेले फाटलेले, नसलेले असे पान. जखमेवर आच्छादनाकरिता उपयुक्त आहे.

**–भङ्ग**–पु., **पत्रखण्डः, पल्लवः** ( ड. सुउ. १४.१०; सुचि. ३२.५; अहृसू. १४.६ ) पानाचा तुकडा. पान. **छदसमूहः** ( असंसू. २६.६ ) पानांचा गुच्छ.

**–यूष**–पु., **यूष० अयमनिलापहः** ( काखिल. ४.४९ ) पानांचा काढा. हा वातनाशक.

**–रङ्ग**–न., **वनस्पति० कुचन्दनम्** ( रा. १२.१२ ) रक्तचन्दन.

**–लवण**–न., **योग० वातादिहरपत्रैः सह लवणमवक्षुद्य यत् क्रियते तत् पत्रलवणम्** ( सुचि. ४.३० )
वातादि दोषहर पानांसह सैंधव कुटून जे केले जाते ते पत्र लवण.

**–वर्ण**–पु., **वनस्पति० सप्तपर्णः** ( रा. १२.१३८ ) सप्तपर्ण, सातवीण.

**–वल्ली**–स्त्री., **वनस्पति० रुद्रजटा** ( रापरि. ३.२५ ) रुद्रजटा.
**पलाशी** ( रापरि. ३.४९ ) आंबट व लांब पानाची वेल.

**–विष**–न., **स्थावरविष० विषपत्रिकालम्बावरदारुकरम्भमहाकरंभाणि पञ्च पत्रविषाणि, पत्रविषेण जृम्भाङ्गोद्वेष्टनश्वासा भवन्ति** ( सुक. २.५-७; असंउ. ४० )
विषारी पाने. वर नावे आहेत. या विषाने जांभई, अंग वळणे, व श्वास हे उपद्रव होतात.

**–वृश्चिक**–पु., **कीट० सविषोऽसावग्निप्रकृतिकः पित्तजरोगान् करोति** ( सुक. ८.८-१२ )
विंचू. विषारी. अग्निप्रकृतीचा. पित्तविकार करतो.

**–शाक**–न., **शाकवर्गः, कर्कश-परिजीर्ण-कृमिजुष्टा-देशजाकालविरोहि पत्रशाकं वर्ज्यम्। एतद्विपरीतं ग्राह्यम्** ( सुसू. ४६.२९७ )
पालेभाजी. भाजीचा वर्ग. खरखरीत जुनाट किडकी अयोग्य जागेतली व अकाली झालेली पालेभाजी वर्ज्य. याच्या उलट स्थितीची पालेभाजी चांगली.

**–श्रेणी**–स्त्री., **वनस्पति० द्रवन्ती** ( रा. ५.३४६ ) उंदीरकानी.

**–श्रेष्ठ**–पु., **वनस्पति० बिल्वः** ( रा. ११.१३४ ) बेल.

**–सेवनी**–स्त्री., **पत्रगतो मध्यदण्डः, पत्रगता मध्यसिरा** ( असंशा. ६.४ )
पानातील मधोमध असलेली दांडी, मधली शीर.

**पत्रक**–न., **वनस्पति० तमालपत्रम्** ( र. १९.३९ ) तमालपत्र.
**तालीसपत्रम्** ( र. ११.९४ ) तालीसपत्र.
**तेजपत्रम्** ( र. ११.९४ ) तेजपान.

**( पत्रिका )**–स्त्री., **वनस्पति० जातिपत्री** ( र. ३०.८१ ) जाईचे पान०

**पत्रक**–न., **वनस्पति० तमालपत्रम्** ( र. १९.३९ ) तमालपत्र.
**तालीसपत्रम्** ( र. ११.९४ ) तालीसपत्र.
**तेजपत्रम्** ( र. ११.९४ ) तेजपान.

**( पत्रिका )**–स्त्री., **वनस्पति० जातीपत्री** ( र. ३०.८१ ) जाईचे पान.

**पत्राङ्ग**–न., **वनस्पति० कुचन्दनम्** ( ध. ३.६ ) लाल चंदन.

**पत्राढ्य**–पु., **पक्षि० मयूरः** ( अहृसू. ७.४३ ) मोरपक्षी.
न., **वनस्पति० पिप्पलीमूलम्** ( रा. ६.११३ ) पिंपळमूळ.
**तालीसपत्रम्** ( ध. २.५३ ) तालीसपत्र.
**कुचन्दनम्** ( रा. १२.१२ ) रक्तचंदन.
**तृणाढ्यम्**–( रापरि. ८.५३ ) पर्वतावरचे गवत.

**पत्राद्य**–न., **खनिज० हरितालभेदः पत्रतालकम्** ( र. ३.७४ ) हरताळप्रकार. पत्री हरताळ.

**पत्राभ्रक**–न., **अभ्रकभेदः, श्वेतपत्रमयः पिनाकः, अस्य पावकसंसर्गाद्दलमोचनं भवति** ( र. २.१५ )
अभ्रकाचा प्रकार. पांढऱ्या काळ्या इत्यादी रंगाच्या पापुद्र्यांनी युक्त. अभ्रक हा विस्तवावर तापविला की त्याचे पापुद्रे सुटे होतात. पीनाक.

**पत्रालु**–पु., **वनस्पति० इक्षुदर्भा** ( रापरि. ८.४७ ) लव्हाळा.

**कासालुः** ( रापरि. ७.२८ ) कासाळू.

**पत्रिन्**–पु., **वनस्पति० दमनम्** ( रा. १०.१२० )
दवणा.
**खदिरः** ( रा. ८.३१ ) खैर.
**तालः** ( रा. ९.९२ ) ताड.

**पत्रोर्ण**–पु., **व्रणबन्धनद्रव्येष्वेकम्। रल्लूकाख्यः कम्बलः। यैर्हरितादीनि देवाङ्गान्युच्यन्ते ते पत्रोर्णाः। धौतकौशेयम्। मागधादिदेशेषु नागवृक्षादयश्चत्वारो वृक्षास्तत्पत्रेभ्यो जातैर्हरिततन्तुभिरूर्णारूपैरूयते तत्** ( सुसू. १८.१६ )
जखम बांधण्याच्या द्रव्यांपैकी एक. कांबळा. धुतलेले रेशमी वस्त्र. मगध इत्यादी देशात नागवृक्ष इत्यादी चार वृक्षांच्या पानापासून निघालेल्या हिरव्या धाग्यापासून लोकरीसारखे विणले जाणारे वस्त्र.

**पथिन्**–पु., **मार्गः** ( सुसू. ३४.५ ) रस्ता.
**शारीर० स्रोतः धात्ववकाशः शरीरच्छिद्रम्** ( चवि. ५.९; असंशा. ६.५० )
शरिरातला मार्ग, स्रोतस, वाहिनी, धातूतील पोकळी, शरिरातील छिद्र.

**(पथि) –च्छेद**–पु., **बिडालादिभिर्मार्गोल्लङ्घनम् प्रयाणावसरे चैतदप्रशस्तम्** ( चइ. १२.२९ )
रस्ता ओलांडणे, रस्त्यात आडवे जाणे. मांजर इत्यादी आडवे जाणे. घरातून काही कामाकरिता जाण्याचे वेळी हे अशुभ आहे.

**–द्रुम**–पु., **वनस्पति० खदिरः** ( ध. १.२७ ) खैर.

**पथ्य**–वि., **पथोऽनपेतम्, स्वस्थस्य स्वास्थ्यरक्षणमातुरव्याधिपरिमोक्षश्चेति पन्थास्तस्मादनपेतम्। मनःप्रियम्** ( चसू. २५.४५ )
मार्ग न चुकलेले, रस्त्यावर असणारे, ठरल्याप्रमाणे चाललेले, निरोग्याचे आरोग्यरक्षण व रोग्याचा रोगनाश हा जणु रस्ता त्यापासून न ढळलेले ते पथ्य. मनाला प्रिय.
**हितकरमाहारविहारौषधादि** ( चसू. १.१००; र. २०.११५; असंसू. २३.२६ )
आरोग्याला हितकर आहार विहार औषध इत्यादी.
न., **भेषजम्** ( चचि. १.३ ) औषध.
**लवण० सैन्धवम्** ( रा. ६.३३ ) सैंधव.

**(पथ्या)**–स्त्री., **वनस्पति० हरीतकी** ( सुचि. २.७४; र. १२.१२१; ध. १.२०५ ) हिरडा.
**वन्ध्यकर्कोटकी** ( रा. ३.२७३ ) वांझकटोली.
**चिर्भटम्** ( रा. ७.२६२ ) चिभडे.
**त्रपुस० मृगाक्षी** ( रा. ७.२५८ )
काकडीपैकी. लहान चिभडे.

**–करा**–स्त्री., **धान्य० व्रीहिः** ( रा. १६.११२ )
तांदळाचा प्रकार.

**–कारिन्**–पु., **व्रीहिः** ( रा. १६.१०१ )
तांदळाचा प्रकार.

**–गण**–पु., **पथ्यवर्गः.** ( सुचि. १७.३ ) **वातादिदोषहरवर्गाः, भद्रदार्वादिचन्दनादिकालेयकादयः** (सु.सू. ३९.७-९)
पथ्याचा वर्ग. वातादि दोष नाशक वर्ग. देवदारु इत्यादी, चंदन इत्यादी, काळा अगरू इत्यादी.

**–वर्ग**–पु., **हितकरद्रव्यसमूहः, घृतं सैन्धवं धान्याकं जीरकमार्द्रकं तण्डुलीयकं पटोलमलाब्वादिकं गोधूमो जीर्णशालिर्गव्यं क्षीरं दधि घृतं हंसोदकं मुद्गाश्चेति पथ्यवर्गः। विशेषतः पारदसेविनाम्** (र. ११.१२६)
हितकर द्रव्यांचा समूह. तूप, सैंधव, धणे, जिरे, आले, तांदुळजा, पडवळ, दुधी, इत्यादी गहू, जुने तांदूळ, गाईचे दूध, तूप, मूग, शरद्ऋतूतील पाणी इ. द्रव्ये, विशेषतः पारा सेवन करणाऱ्याला पथ्यकर.

**–शाक**–पु., **वनस्पति० तण्डुलीयकः** (रा. ५.१७५)
तांदुळजा.

**पथ्या**–स्त्री., **वनस्पति० हरीतकी** (ध. १.२०५) हिरडा.

**–घृत**–न., **घृत० पाण्ड्वामयगुल्महरम्** ( चचि. १६.५० )
हिरड्याने तयार केलेले तूप. पांडु गुल्म नाशक.

**–फल**–न., **हरीतकीफलम्** ( सुउ. १६.८ )
हिरड्याचे फळ.

**–वृन्त**–**हरीतकीफलबन्धनम्, अस्थिरहितं फलम्** ( चचि. १६.५० )
हिरड्याच्या फळाचा देठ. अठळीरहित फळ, बाळहिरडा—कोवळा हिरडा.

**–पथ्यादिचूर्ण**–न., **हरीतक्यादिचूर्णम् विसूच्यजीर्णशूलारुचिनाशनम्.** ( सुउ. ५६. १४ )
हिरडा इत्यादी चूर्ण. अजीर्णजन्य, शूल, वांती अतिसार बेचव नाशक.

**पथ्योपचारज्ञ**–वि., **हितकरचिकित्सादिविद् (वैद्यः)** ( असंसू. २३.२८ )
हितकर उपचार जाणणारा तज्ञ वैद्य.

**पद्**–न., शक्तिमदक्षरम्, तत्तत्पदानां तत्तदर्थेषु रूढत्वं शक्तिः, तस्याश्च ग्रहो व्याकरणोपमानादिष्वायत्तः अक्षरसमूहः ( चवि. ८.२७ )
अर्थ व्यक्त करण्याची शक्ति असलेले अक्षर, व्याकरणादीनी ती व्यक्त करणारा अक्षरांचा समूह.
**शस्त्रपदम्, शस्त्रस्थानम्** (सुचि. १.२९;सुसू.५.७) शस्त्राचे स्थान. शस्त्राने कापलेला शरिराचा भाग.
**क्षतम्** ( ड. सुक. ४.१५ ) जखम.
**–शतमात्र–**( अव्य. ) केवलं शतानि पदानि ( असंसू. १०.५९ )
केवल शंभर पावले अंतर. शतपावली.

**पदाघातन**–न., पद्भ्यामुद्वर्तनम् ( चनि. ६.४ )
पायाने तुडवणे, पाय देणे, पायाने चेपणे.

**पदाङ्गी**–स्त्री., वनस्पति० हंसपादी ( रा. ५. १६७ )
राजहंस.

**पदातिचर्या**–स्त्री., पद्भ्यां गमनम् ( सुचि. ११.११ )
पायांनी चालणे, वाटचाल.

**पदार्थ**–पु., तन्त्रयुक्ति० पदस्य पदयोः पदानां वाऽर्थः ( चसि. १२.४१ ) सूत्रे पदे वा योऽर्थोभिहितः स पदार्थः। यथा वेदोत्पत्त्यध्याये वेदपदस्याऽऽयुर्वेद इत्यर्थः, स एव पदार्थः, पद्यते गम्यते येनार्थ इति सूत्रस्यापि पदत्वात् सूत्रे योऽर्थः प्रतिपादितः सः पदार्थः ( सुउ. ६५.१० )
एका पदाचा वा अनेक पदांचा जो अर्थ तो पदार्थ. सूत्रात पदात जो अर्थ विवक्षित आहे तो पदार्थ. जसे वेदोत्पत्ति या अध्यायात वेद या पदाचा. आयुर्वेद असा अर्थ आहे, तो पदार्थ याचा ज्याने सांगितला जातो जाणला जातो तो पदार्थ. सूत्र हे पदच आहे म्हणून सूत्रात जो अर्थ सांगितला जातो तो पदार्थ.
**वस्तु, द्रव्यम्** ( र. ७.५-९ ) वस्तु, द्रव्य.

**पदिका**–स्त्री., वनस्पति० हंसपादी ( रा. ५.१६७ )
राजहंस.

**पद्म**–पु., सर्प० दर्वीकरभेदः, पद्मः ( सुक. ४.३४-(१) द्र० ' सर्प ' एक साप, नागाचा प्रकार.
न., सङ्ख्या० दशार्बुदप्रमाणम्, अर्बुदेत्यनेन दश-कोटिसङ्ख्या, तादृग दशार्बुदं शतकोटिप्रमाणम् ( सुउ. ६०.२२ )
संख्या, शंभर कोटी. दहा अर्बुदे. अर्बुद म्हणजे दहा कोटी.
**खनिज० सीसकम्** ( रा. १३.२१ ) शिसे.
**वनस्पति० कमलम्** (रा. १०.२४३; र. १६.१२३; असंसू. १२.८६ ) मूत्रविरजनीयगणोक्तमेकं द्रव्यम् ( चसू. ४.१५ ) निर्वापणप्रदेहोक्तमेकं द्रव्यम् ( चसू. ३.२६ ) आसवोपयोगि द्रव्यम् ( चसू. २५.४९ )
कमळ. मूत्रांतील दोषनाशक द्रव्यगणातील एक द्रव्य. शामक लेपातील व आसवोपयोगी द्रव्य.
**सरक्तमष्टदलपद्मम्** ( चक्र. चसू. २५.४९ )
तांबडे आठ पाकळ्यांचे कमळ.
**रक्तकमलम्** ( चसू. २४.२२; सुउ. ३९.२३६ )
तांबडे कमळ.
**ईषच्छुक्लं कमलम्** ( ड. सुउ. ४७.५८ )
थोडे पांढरे कमळ.
**सूर्योदयविकासि कमलम्, शाकत्वेनोपयुज्यते। तद्गुणाः– सतिक्तं मधुरं शीतं पित्तकफापहं च** ( सुसू. ४६.२८५ )
सूर्योदय विकासी –सूर्यविकासी कमळ. याची भाजी उपयुक्त. **गुण**–थोडी कडु गोड थंड पित्त कफनाशक.

**( पद्मा )**–स्त्री., कीट० आग्नेयी लूता, स्वेदजेयं पित्तविकारान् करोति (असंउ.४४) तद्दंशलक्षणानि– अस्या दंशे पद्माभस्फोटो भवति। स तु भिन्नः सन् पुनरभिन्नो भवति। स्फोट आशु क्लिद्यत्युष्णं च क्लेदं स्रवति। स्पर्शेऽतिवेदना भवति (असंउ. ४५)
किडा. घामापासून उत्पन्न होणारा हा किडा पित्त-विकार करतो. **डसल्याची लक्षणे**–कमळासारखा फोड, तो फ़ुटतो पुन्हा सांधला जातो. लवकर भरतो व ऊन पाणी स्रवते, स्पर्शाने फार वेदना होतात.
**वनस्पति० भार्गी** ( ध. १.६८; ड. सुउ. ४०.७३ हे. अहृसू. १५.३७ ) भारंगी.
**ब्राह्मणयष्टिका पुरीषसङ्ग्रहणीयगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१५ )
द्रवमल प्रवृत्ति बंद होऊन मळ बांधलेला व्हावा म्हणून उपयुक्त द्रव्यांच्या गणातील एक द्रव्य.
**पद्माकारा पद्मरक्ता पद्मगन्धौषधिः द्रोणीप्रावेशिक-रसायनप्रयुक्ता** ( चचि. १ (४) ७ )
कमळाकार, कमळासारखी तांबडी, व वास असणारी डोणीमध्ये प्रवेश करून होणाऱ्या रसायनप्रयोगात उपयुक्त औषधी.
**मञ्जिष्ठा** ( रा. ६.१५ ) मंजिष्ठ .

शाक० फञ्ज्यादिशाकवर्गोक्तमेकं शाकम्
( रापरि. ७.९४ )
फञ्ज्यादि शाकवर्गात सांगितलेली एक भाजी.

**पद्मप्राचारिणी** ( जज्जट ) ( चचि. ३.२५८ )
**पद्मचारिणी** ( सु.शा. १०.६०; अरु. अहृसू. १५.२७; ध.४. ९० ) स्थल कमलिनी.
**तस्या गुणाः–सुगन्धा गौल्या तिक्ता शीता मोहापस्मारवान्तिमेहभूतातिसाररक्तपित्तहरा च**
( ध. ४.९०; रा. ५.१३३ )
सुंदर फुलांची जाड व सुगंधी मुळाची कमळासारखी वनस्पती. **गुण**—सुगंधी, गोड, कडु, थंड, विचारशक्ति कमी होणे, अपस्मार वांती, प्रमेह, अतिसार रक्तस्राव व भूतबाधा नाशक.

**–कण्टक**–पु., न., क्षुद्ररोगः पद्मिनीकण्टकः क्षुद्रकुष्ठानामेकतममवभासिनीत्वगधिष्ठानम् (सुशा. ४.४)
कमळ काटा. त्वचेचा विकार, क्षुद्र कुष्ठ, अवभासिनी त्वचेचा विकार.

**–कन्द**–पु., वनस्पति० **तद्गुणाः –कषायः कटुस्तिक्तविपाकी रूक्षो विष्टम्भी शीतबीजो रुच्यः पित्तकफापहोऽस्रपित्तविनाशनःका सतृष्णादाहनिवारणश्च**, ( ध. ४.१६४ ) द्र० 'शालूक'
कमळमूळ ( कंद ) तुरट, तिखट, कडु, रूक्ष, अवष्टंभक, रुचिवर्धक, पित्तकफनाशक, रक्तपित्तनाशक, खोकला, तहान, दाह नाशक.
**शाक० कमलस्य कन्दः, तद्गुणाः –कषायो हिमो मधुरविपाकी मारुतकोपनः पित्तशमनश्च**
( सुसू. ४६.३०८ )
भाजी, कमळकंदाची. **गुण**– तुरट, थंड, पचल्यानंतर गोड, वातप्रकोपक, पित्तशामक.

**–कर्कटी**–स्त्री., **वनस्पति० पद्मबीजम्** ( ध. ४.१५९ )
कमळकाकडी, कमळबी.

**–काष्ठ**–न., **वनस्पति० पद्मकः** ( रा. १२.१५० )
पद्मकाष्ठ.

**–किञ्जल्क**–पु., न., **वनस्पति० पद्मकेसरम्, पद्मपुष्पतन्तुः, रक्तपित्ते उपयुक्तम्** (चचि. ४.६७)
**गर्भस्थापनविधौ लेह्यद्रव्यम्** ( चशा. ८.२४ )
**साङ्ग्राहिकरक्तपित्तप्रशमनानां श्रेष्ठम्**(चसू. २५.४०)
कमळकेसर-रक्तपित्त नाशक व गर्भस्थापन या करिता चाटण्यासाठी उपयोगी. रक्ताचा पातळपणा कमी करणे व रक्तपित्त नाशक द्रव्यात श्रेष्ठ.

**–कीट**–पु., कीट० **सविषोऽयं, अग्निप्रकृतिकोऽसौ पित्तजविकारान् करोति** ( सुक. ८.१०; असंउ. ४३ )
विषारी किडा. पित्तज विकार करतो.

**–केशर**–न., **वनस्पति० कमलकिञ्जल्कः**
( चसू. ५.६५; सुसू. ३८.४६ )
कमळकेशर.

**–केसर**–न., **वनस्पति० कमलकिञ्जल्कः पुरीषसङ्ग्रहणीयगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१५ )
**तद्गुणाः– मधुरं कटु शीतं रूक्षं रुच्यं पित्तघ्नं तृष्णारक्तक्षयास्यव्रणदाहघ्नं च** ( ध. ४.१६५ )
कमळकेशर. मळ बांधीव करणाऱ्या गणातील एक द्रव्य.
हिं.—कमलकेसर.
म.—**कमलकेसर.**
गु.—कमलकेसर.
बं.—पद्मरेनू.
**गुण**–गोड, तिखट, थंड, रूक्ष, रुचकर, पित्तनाशक, तहान, रक्तक्षय, तोंडाचे व्रण व दाहनाशक.

**–चारिणी**–स्त्री., वनस्पति० **पद्मा** ( ध. ४.९० )
सुगंधी व जाड मुळाची पाण्यात होणारी वनस्पती.

**–तन्तु**–पु., **वनस्पति० बिसम्** ( रा. १०.२५८ )
कमळाचे तंतु. बिस.

**–तीर्थ**–न., **वनस्पति० पाठा** ( ध. १.७१–७२ )
पहाडमूळ.

**–नाल**–न., **वनस्पति० बिसम्** ( ध. ४.१६१ )
कमळाचा नाळ. ( दांडा ); कमलतंतु.

**–पत्रक**–पु., न., **वनस्पति० कमलम्** (र. १८.१०७)
कमळ.
**पुष्करमूलम्** ( र. १८.१०६–१०८; रा. ६.९२ )
पुष्करमूळ.

**–पल्लव**–पु., न., **शाक० तद्गुणाः–कषायः शीतः स्तम्भनः पित्तातिसारिणां हितः** ( चसू. २७.१०५ )
कमळाचे पान. भाजी. तुरट, थंड, मळाचे स्तंभन करणारे, पित्तातिसार नाशक.

**–पुष्कर**–न., **पद्मकर्णिका** ( ड. सुनि. १३.११ )
कमलपुष्पातील गोल भाग.

**–बीज**–न., **वनस्पति० कमलबीजम्** ( चचि. २९.६४ )
कमळबी, कमळकाकडी.
**श्वेतश्लक्ष्णबहुपुटकन्दः, पित्तसंशमनवर्गोक्तमेकं द्रव्यम् । सर्पच्छत्रकमिति लोके** ( सुसू. ३९.८ )

**तद्गुणाः मधुरं तिक्तं गर्भस्थापनं पित्तघ्नं रक्तपित्तहरं च** ( ध. ४.१५९ )
पांढरा चिकण अनेक पुटे असलेला कंद, पित्तशामक वर्गांतील एक द्रव्य. सर्पछत्रक. असे लोक म्हणतात.
**गुण**—गोड, कडु, गर्भस्थापक, पित्तनाशक, रक्त, पित्तनाशक.

**–मध्य**–न., **पद्मवराटकम्** ( सुचि. २५.३८ )
कमळकाकडी.
**पद्मकेसरम्ः**– ( सुचि. २५.३९ ) कमळकेशर.

**–मूल**–न., **वनस्पति० पद्मकन्दः** ( ध. ४.१६३ )
कमळकंद.

**–रजस्**–न., **पद्मकेशरम्** ( अहृसू. १५.३७ )
कमळकेशर.

**–राग**–पु., **रत्न०** ( र. ४.३; असंसू. १२.१९ )
माणिक.

**–रूपिणी**–स्त्री., **वनस्पति० वृक्षादनी** ( ध. ४.९७ )
बांदे, बांडगूळ.

**–वती**–स्त्री., **वनस्पति० पद्मिनी** ( ध. ४.१५७ )
कमळिणी.
**पद्मा** ( ध. ४.९० )
कमळासारखी जाड व सुगंधी मुळांची पाण्यात होणारी वनस्पती.

**–वृक्ष**–न., **वनस्पति० पद्मिकः** ( रा. १२.१५० )
पद्मकाष्ठ.

**–हस्त**–वि., **पद्माकाररेखा हस्ततले यस्य, तथाविधो वैद्यः** ( र. ७.२८ )
ज्याच्या हातावर कमळाकार रेषा आहेत, कमळ आहे, असा वैद्य.

**पद्मक**–पु., न., **वनस्पति० कुष्ठम्** ( रा. १२.९८ ) कोष्ठ.
**हेमपद्मम्** ( अहृसू. १५.१२ ) पिवळे कमळ.
**मरुद्भवः** ( अरु. १५.१६ ) पद्मकाष्ठ.
**पद्मकाष्ठम्** (चसू. ५.२१; सुसू. ३८.३९) पद्मकाष्ठ.
**शिरोरुजि प्रदेहोपयोगि** ( चसू. ३.२४ )
डोकेदुखीवर लावण्यास.
**वेदनास्थापनगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१८ )
वेदना कमी करणाऱ्या गणातील एक द्रव्य.
**महाकषायवर्गे वर्ण्यगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१० )
वर्णाला हितकरगणातील एक द्रव्य.
**निर्वापणप्रदेहोपयुक्तम्** ( चसू. ३.२७ )
दोषशामक लेपाकरिता उपयुक्त.
**धूमपानोपयोगिद्रव्यम्** ( चसू. ५.२१ )
धूम्रपानाला उपयुक्त द्रव्य.
**पद्मकगुणाः– कषायस्तिक्तः शीतः स्निग्धो गर्भस्थैर्यकरः पित्तघ्नो रक्तपित्तज्वरच्छर्दिविषमोहदाहभ्रान्तिकुष्ठविस्फोटनाशनश्च** ( ध. ३.८८ )
हिं.—पद्माख.
**म.—पद्मकाष्ठ.**
गु.—पद्मकथि.
बं.—पद्मकाष्ठ.
**गुण**—तुरट, कडु, थंड, स्निग्ध, गर्भ स्थिर करणारे, पित्तनाशक, रक्तस्राव, ताप, दाह, ओकारी, कुष्ठ, फोड, विष, भ्रांती, विचाराचा गोंधळ नाहीसा करणारे.

**पद्मकादिगण**–पु., **द्रव्यगण० पद्मक-पुण्ड्र-वृद्धि-तुगर्द्धि--शृङ्ग्यमृता-जीवन्ती-काकोली-क्षीरकाकोली-मेदा-महामेदा-मुद्गपर्णी-माषपर्णी-मधुकर्षभक-जीवकाः । अयं स्तन्यकरः प्रीणनो बृंहणो जीवनो वृष्यो मारुतपित्तघ्नश्च** ( असंसू. १६.६; अहृसू. १५.१२ )
पद्मकाष्ठ इत्यादी गण–पिवळे कमळ, कुष्ठ वृद्धि, वंशलोचन ऋद्धि, काकडाशिंगी गुळवेल जीवन्ती ( हरिणदोडी ) रानमूग रानउडीद, व इतर वर दिलेल्या वनस्पती. हा गण अंगावरील दूध वाढविणारा. पोषक पौष्टिक जीवन चालवू शकणारा शुक्राला हितकर वातपित्तघ्न.

**पद्मकादिहिम**–पु., **पद्मकादीनां शीतकषायः, सिराव्यधे रक्तेऽतिप्रवृत्ते स्तम्भकोऽयम्** ( अहृसू. २७.४९ )
पद्मकाष्ठ इत्यादीचा हिम-थंड काढा. सिरा तोडल्यानंतर होणारा रक्ताचा अतिस्राव कमी करणारा.

**पद्माकार**–वि., **पद्मकर्णिकासदृशम्** ( सुनि. १६.४३ )
कमळाकार.

**पद्माक्ष**–न., **वनस्पति० पद्मबीजम्** ( ध. ४.१५९ )
कमळबी.

**पद्माह्वा**–स्त्री., **वनस्पति० पद्मा** ( रा. ५.१३१ )
पहा ' पद्मचारिणी '

**पद्मिनी**–स्त्री., **वनस्पति० पद्मा** ( रा. ५.१३१ )
सुगंधी व जाड मुळाची पाण्यात वाढणारी वनस्पती
**तद्गुणाः– मधुरा तिक्ता कषाया शीता रूक्षा कफपित्तघ्नी कृमिशोषवान्तिभ्रान्तिसन्तापनाशनी च** ( ध. ४.१५७ )
गोड, कडु, तुरट, थंड, रूक्ष, कफपित्तनाशक, कृमि, क्षय, वांती भ्रांतिसंतापनाशक.

**–कण्टक**–पु., क्षुद्ररोग० कफवातजोयम्, अस्याधिष्ठानमवभासिनी त्वक्। तल्लक्षणम्-पद्मिनीकण्टकसदृशैः कण्टकैराचितं वृत्तं कण्डूमत् पाण्डुमण्डलं शरीरे भवति ( सुनि. १३.४०; असंउ. ३६ )
कफवातज रोग. अवभासिनी त्वचा हे याचे स्थान. लक्षण–कमळिणीचे काट्यासारखे काटे असणारा रोग. वाटोळे काटे व खाजयुक्त पांढरट मंडळ असते.

**–कर्दम**–पु., योग० विसर्पे प्रदेहोपयोगी ( चचि. २१.८१ )
एक औषधीयोग विसर्पात लेपाकरिता.

**–पुट**–पु., नलिनीपत्रम् ( अहृसू. ३.३९ )
कमळपान.

**पद्मोत्तर**–न., वनस्पति० कुसुम्भम् ( ध. ६.११८ )
कर्डई ( करडई ).

**पद्मोत्तरिका**–स्त्री., वनस्पति० कुसुम्भः ( चसू. २६.८४)
कर्डई ( करडई )

**पद्मोत्तरिकानाशक**–न., वनस्पति० कुसुम्भः ( असंसू. ९.१५. ) कर्डईची पाने ( भाजी )

**पद्मोत्पलकन्दासव**–पु., आसुत० अम्लफलानामनुपानमिदम् ( सुसू. ४६.४३३ )
कमल व निळे कमळ यांच्या कंदाचे आसव. आंबट फळे खाल्ल्यानंतर अनुपान म्हणून पिण्यास.

**पद्य**–न., वनस्पति० पाठाभेदः, श्वासारिः ( ध. १.७२ )
पहाडमुळाचा प्रकार. श्वासनाशक.
**पुष्करमूलम्** ( रा. ६.९२ ) पुष्करमूळ.

**पनस**–पु., सर्प० मण्डली (सुक.४.३४(२) मंडली सर्प.

**(पनसी)**–स्त्री., क्षुद्ररोगः पनसिका ( सुचि. २०.५ )
एक कानाचा रोग.
(न.,) **फल० बहिःकण्टकि, महाफलम्** ( सुसू. ४६.१८१ ) **पनसगुणाः – मधुरं पिच्छिलं गुरु हृद्यं बलवीर्यवृद्धिदं ग्राहि दुर्जरं रुचिकृत् श्रमदाहशोफघ्नम्। तद्बीजमीषत्कषायं गुरु वातलं तत्फलस्य च विकारघ्नं रुच्यं त्वग्दोषनाशनम्। बालं पनसं हृद्यं नीरसं मध्यपक्वं तु दीपनम्** ( रापरि. ११.९ ) **संपक्वं कषायं स्वादु स्निग्धं गुरु च** ( चसू. २७.१४३–१४४; सुसू. ४६.१८१; अहृसू. ६.११९ )
फळ. बाहेरून काटेरी असे फणस. मोठे फळ. **गुण**—गोड, बुळबुळीत, जड, पचायला जड, भसरट मळ बांधीव करणारा, रुचकर, हृदयाला हितकर, बलवीर्य वाढविणारा, थकवा, दाह, सूजनाशक. **बी**–थोडे तुरट, जड, फणस खाल्ल्यामुळे झालेला विकार नाशक. रुचकर, त्वचेचे दोषनाशक, वातूळ. **बालफणस**–नीरस पण हृदयाला हितकर. **मध्यम पिकलेला**–अग्निदीपक. **चांगला पिकलेला**–थोडा तुरट गोड स्निग्ध व गुरु.

**पनसास्थि**–न., **पनसफलबीजम्** ( सुनि.२.१२ )
फणसाच्या फळाचे बी.

**पनसिका**–स्त्री.,क्षुद्ररोगः,श्लेष्मवातजेयम्, **कर्णस्याभ्यन्तरे परिसमन्तात् पृष्ठे वा कमलशालूकनिभा कठिनोग्रवेदना पिडका जायते** (सुनि. १३.१२; असंउ.३६) कानातील रोग. कानाच्या आत भोवताली पाठीमागच्या बाजूला कमळकंदासारखी कठिण व उग्र वेदना असलेली पुळी होते.

**पन्नग**–पु., सर्पः ( सुक. ४.११; असंउ. ४१ ) साप.

**( पन्नगी )**–स्त्री., **सर्पिणी** ( इन्दु.असंउ.४१ ) सर्पीण.
वनस्पति० **सर्पिणी** ( रापरि.५.३९ ) सर्पीण.

**पन्नरूपा**–वि., **नष्टरूपा** ( चइ. ७.३. )
नष्ट झालेली, नष्टप्राय.

**पन्नरूपीय**–वि., **पन्नरूपामधिकृत्य कृतम्** ( चइ.७.१ )
अध्यायाचे नाव. जी लक्षणे मरणसूचक असतात त्याबद्दलची माहिती यात आहे.

**पन्नरूपेन्द्रिय**–न., अध्याय० ( चइ. ७.१ )
अध्यायाचे नांव, यात विकृत झालेल्या इंद्रियांच्या रूपाची माहिती आहे.

**पयस्**–न., दुग्धम् (चचि. ३.२३९) द्र० **'दुग्धम्' दूध.**
न., जलम् ( ध. ६.३०२; सुउ. ५८.६० ) **पाणी.**
**क्षीररूपो वृक्षस्रावः** ( र. २.२८ )
झाडाचा दुधासारखा स्राव.

**–स्विनी**–स्त्री., वनस्पति० **क्षीरकाकोली** (ध. १.१३४)
दूध असणारी. क्षीरकाकोली. अष्टवर्गांपैकी एक.
**क्षीरतुम्बी** ( रा. १.२३९ )
दुधी, दुध्या भोपळा.
**क्षीरविदारी** ( ध. १.१४९ )
भुईकोहळाप्रकार. पांढरा भुईकोहळा.
**दुग्धफेनी** ( रापरि. ५.३४ ) एक वनस्पती.

**( पयः )–कन्दा**–स्त्री., वनस्पति० **क्षीरविदारी** ( रा. ७.१९७ ) पांढरा भुईकोहळा.

**–क्षीर**–न., वनस्पति० **तवक्षीरम्** ( रा. ६.८८ )
वंशलोचन.

**( पयो )-धर**–पु., स्तनः, स्तन्याशयः ( सुशा. ४.२४; असंशा. २.११) दूध धारण करणारे. स्तन.

**–धिज**–न., भैषज्य० **समुद्रफेनम्** ( ध. ३.१५४ ) समुद्रफेस.

**–पाक**–पु., कल्प० **क्षीरक्वाथः, तद्विधिः–द्रव्यादष्टगुणं क्षीरं, क्षीराच्चतुर्गुणं च तोयं गृहीत्वा क्षीरावशेषः कर्तव्यः** ( सुचि.२.४७ ) दुधाचा काढा. **विधी**–द्रव्याच्या आठपट दूध व दुधाच्या चौपट पाणी घालून दूध शिल्लक ठेवावे.

**–फेनी**–स्त्री., वनस्पति० **दुग्धफेनी** ( रापरि. ५.३४ ) एक वनस्पती.

**–भव**–न., **घृतम्, नवनीतम्** ( र. १२.५३ ) लोणी, तूप.

**–युत**–वि., **क्षीरयुक्तम्** ( सुशा. १०.६२ ) दूधयुक्त.

**–लता**–स्त्री., वनस्पति० **क्षीरविदारी** ( रा. ७.१९७ ) पांढरा भुईकोहळा.

**–वहस्रोतस्**–न., ( परिव० ) **स्तन्यवहसूक्ष्ममार्गः** (काखिल. ११.६३) दूध वहाणारी सूक्ष्मवाहिनी.

**–विदारिका**–स्त्री., वनस्पति० **क्षीरविदारी** ( रा. ७.१९७ ) पांढरा भुईकोहळा.

**–वृत्ति**–स्त्री., वि., **क्षीरवृत्तिः वृत्तिर्जीविका, क्षीरेण जीविका नाम पयसा भोजनम्** ( सुचि. १४.१७ ) **क्षीरभोजी** ( चचि. १ ( ३ )९ ) दुधावर जीविका ( पोषण ) असणारा. दुग्धाहारी. दुधावर रहाणारा.

**–हेतु**–न., **आहारद्रव्य० पय एव हेतुः कारणं यस्य तद् दधि** ( ध. ६.१८८ ) दही. दूध हेच कारण असलेले.

**पयस्या**–स्त्री., **वनस्पति० कुटुम्बिनी** ( रा. परि. ५.२१ ) पाण्यात होणारी दुधाळ वनस्पती.
**शतावरी** ( र. २२.७६ ) शतावरी.
**श्वेतदूर्वा** ( सुक. ८.१३२ ) पांढरी दूर्वा.
**दुग्धिका** ( सुउ. ५८.५९; र. २०.७१ ) दुधी.
**काकोली** ( चसू. ४.१० ) कावळी.
**क्षीरकाकोली** ( र. २९. ७१; रा. ३.१६९; सुउ. १७.८९) दुधी कावळी.
**इन्द्रोक्ता रसायनी वनस्पतिः** ( चचि.१(४).६ ) दुधी कावळी, रसायन–सर्व धातुपरिपोषण करणारी.
**वाजीकरणार्थमुपयुज्यते** ( असंउ. ५० ) शुक्रवृद्धीकरिता योजतात.
**विदारीकन्दः, बृंहणीयवर्गोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.९ ) भुईकोहळा, पौष्टिकवर्गातील एक.
**क्षीरिणी, पुरीषविरजनीयगणेष्वेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१५ ) दुधी. मळातले दोषनाशक गणातील द्रव्य.
**अर्कपुष्पी** ( ड. ) **रक्तातिसारनाशिनी** ( सुउ. ४०.१२० ) **जेज्जट** ( सुचि. १७.८; चक्र. चचि. २९.९२; असंसू. ८.५३ ) **अर्कसदृशपत्रपुष्पा लता, लूताविषे पानार्थम् उपयुज्यते** (सुक.८.१३२) **गर्भपतनेऽदृष्टशोणितवेदनावस्थायां प्रतिकारद्रव्येषु एकम्** ( सुशा. १०.५७ ) **गर्भस्रावपरिहारोपयोगि द्रव्यम्** ( सुशा. १०.५९ ) **बल्या मूत्रदोषहरा** (सुउ.५८.५९) **पित्ताधिकवातरक्ते पानप्रदेहोपयोगि द्रव्यम्** ( सुचि. ५.८ ) रुईच्या पानासारखी पाने व फुलासारखी फुले असणारी वनस्पती. विषारी किड्याच्या विषावर पिण्यास. गर्भपात होत असता रक्त व वेदना नसलेल्या अवस्थेत उपयुक्त द्रव्यांपैकी एक. गर्भस्राव-निरोधक. बलकर मूत्रदोषनाशक. रक्तातिसारनाशक. पित्ताधिक वातरक्तात लेप व पिण्याकरिता उपयोगी.
**क्षीरविदारी** ( चसू. ४.१०; ड. सुचि. १७.८ ) पांढरा भुईकोहळा.
**महाकषायवर्गे बल्यगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१० ) **महाकषायवर्गे वर्ण्यगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१० ) **पित्ताधिकवातरक्ते पानप्रदेहोपयोगि द्रव्यम्** ( सुचि. ५.८ ) बल्य व वर्ण चांगला करणाऱ्या गणातील द्रव्य. पित्ताधिक वात रक्तात पिणे व लेप याकरिता उपयुक्त.

**पयस्यादिक्वाथ**–पु., **योग० पक्वपित्तरक्तातिसारनाशनः** ( सुउ. ४०.७४-७५ ) भुईकोहळा इत्यादी काढा. पक्व पित्तरक्तातिसार-नाशक.

**पयस्यादिलेप**–पु., **योग० अक्षिरागरुजाहः** ( सुउ. १७.८९ ) भुईकोहळा इत्यादींचा लेप. डोळ्याची लाली व वेदना नाशक.

**पर**–वि., **अन्यत् अतिरिक्तम्** ( चचि. ४.४ ) दुसरा, परका, निराळा.
( अ., ) **अनन्तरम् परस्तात्** ( चचि. ४.४ ) नंतर, पलीकडे.

प्रतिवादी ( चवि. ८.१८ ) दुसरा, परका, निराळा. उत्तर देणारा.

**अन्यो भूतादिः** ( ड. सुउ. ३९.५६ ) अन्य, दुसरा, भूत इत्यादी.

**–तन्त्र**–न., **अन्यच्छास्त्रम्, शालाक्यादितन्त्रम् साङ्ख्यदर्शनम्, अन्यस्य शास्त्रम्; सुश्रुतसंहिता स्वतन्त्रमित्युच्यते, तद्भिन्नमन्यत् परतन्त्रम्** ( सुशा. १.२२ ) **न्यायवैशेषिकहस्तिशिक्षा-व्याकरणादि** ( सुचि. २८.२७ ) दुसरे शास्त्र. शालाक्य–सळईच्या उपचारांचे शास्त्र. सांख्यशास्त्र–दुसऱ्याचे शास्त्र. सुश्रुतसंहिता ही स्वतःचे तंत्र मानणारांना त्याखेरीज इतर तंत्र ते अन्य तंत्रशास्त्र होय. न्याय वैशेषिक हत्तीचे वैद्यक शिक्षाशास्त्र व्याकरणादि.

**–तन्त्रवृत्ति**–वि., **परतन्त्रा वृत्तिर्जीवनं यस्य स गर्भः, मातुराहाररसाज्जीवनमस्येत्यसौ परतन्त्रवृत्तिः** ( चशा. ६.२३; असंशा. २.३२ ) दुसऱ्यावर ज्याचे जीवन अवलंबून असते तो गर्भ. मातेच्या आहाररसावरच याचे जीवन असते म्हणून हा गर्भ परतंत्रवृत्ति आहे.

**–दारगमन**–न., **परस्त्रीसङ्गः, इदमनायुष्याणां श्रेष्ठम्** ( असंसू. १३.३ ) परस्त्रीसंग, हा आयुष्य नाश करणाऱ्या कारणात श्रेष्ठ.

**–दाराभिगमन**–न., **परस्त्रीसङ्गः, इदमनायुष्याणां श्रेष्ठम्** ( चसू. २५.४० ) पहा 'परदारगमन.'

**–पुष्ट**–पु. वनस्पति॰ **आम्रः** ( ध. ५.१ ) आंबा. पक्षि॰ **कोकिलः** ( अहसू. ३.२४ ) कोकीळ. दुसऱ्याने ( कावळ्याने ) पोषण केलेला.

**–भृत्**–पु. पक्षि॰ **कोकिलः** ( अहसू. ७.१६ ) कोकीळ. दुसऱ्याने ( कावळ्याने ) पोषण केलेला.

**–भृत**–पु. पक्षि॰ **प्रतुदजातीयः कोकिलः** ( सुसू. ४६.६७; असंसू. ७.७२ ) कोकीळ. दुसऱ्याने ( कावळ्याने ) पोषण केलेला.

**–मद**–पु., रोग॰ **मद्यपानजन्योऽयम्, असौ त्रिदोषजः, तल्लक्षणम्–ऊष्माऽङ्गगुरुता विरसाननत्वं श्लेष्माधिकत्वमरुचिमलमूत्रसङ्गस्तृष्णाशिरोरुजा सन्धिभेदश्च** ( सुसू. ४७.१७ ) दारू प्याल्याने आलेला माज. हा त्रिदोषज होय. लक्षण—उकडते, अंग जड, विरस, तोंड बेचव कफ अधिक असतो, मळ व मूत्र यांचा अवरोध, तहान, डोकेदुखी, सांधे फुटणे, ही चिन्हे असतात.

**–रात्र**–न., **रात्रेः पश्चिमो यामः** ( असंनि. १.१५ ) रात्रीचा शेवटचा प्रहर. उत्तररात्र.

**–वारि**–न., **अन्यकृतं तडागादि** ( असंसू. ३.७१ ) दुसऱ्यांनी केलेले तलाव विहीर इत्यादी जलाशय.

**–विद्या**–स्त्री., **श्रेष्ठा विद्या, यथा–श्रीरसाङ्कुशाख्या** ( र. ७.२३ ) श्रेष्ठ विद्या. जसे श्रीरसांकुशा नावाची विद्या.

**–शस्य**–न., **परक्षेत्रम्, परधान्यं वा** ( सुचि. २४.९२ ) दुसऱ्याचे शेत. दुसऱ्याचे धान्य.

**–संस्तम्भ्या**–वि., **परेण अन्येन प्रकृतौ स्थापनीया; न स्वयमात्मानं सत्त्वबलात् स्तम्भयति** ( चक्र. चवि. ८.९४ ) आपण आपल्याला मनाच्या बळाने न सावरणारा. दुसऱ्याने खूप धीर दिल्यानंतर स्वस्थ होणारा.

**–हित**–पु., योग॰ **सर्वकुष्ठविनाशनः** ( र. २०.९१ ) औषधीयोग. सर्वकुष्ठनाशक.

**परमसूक्ष्म**–वि., **अमूर्तः, प्रत्यक्षप्रमाणेनावगन्तुं न शक्यः, अनुमानग्राह्यश्चेतनावान् पुरुषः, अणुरूपेण वर्तमानोऽपि प्रत्यक्षेणानुपलब्धः** (ड. सुशा. १.१६) अतिसूक्ष्म. अमूर्त. प्रत्यक्ष प्रमाणाने जाणणे अशक्य व अनुमानाने कळणारा. चेतनावान्; अणुरूपाने असूनही ज्याचे प्रत्यक्ष ज्ञान होत नाही असा पुरुष.

**परमाणु**–पु., **सूक्ष्मतमः अतिसूक्ष्मोऽणुः** ( चशा. ७.१७; असंशा. ५.१०१ ) अतिसूक्ष्म. सूक्ष्मतम अणु.

**–विभाग**–पु., **परमाणूनां विभजनम्, तत्कारणं न केवलो वायुः किन्तु कर्मस्वभावपरिगृहीतो वायुः** ( चशा. ७.१७ ) परमाणूंचे विभजन–भाग करणे. असे भाग करणारे कारण केवळ वायु नाही कर्मस्वभावाने जेव्हा वायु तेथे असतो तेव्हा तो कारण होतो.

**–संयोग**–पु., **परमाणूनां संयोगः, तत्कारणं न केवलो वायुः किन्तु कर्मस्वभावपरिगृहीतो वायुः** ( चशा. ७.१७ ) परमाणूंचा संयोग. त्याचे कारण केवळ वायु नाही परंतु कर्मस्वभावाने युक्त वायु असतो.

**परमात्मलिङ्ग**–न., **प्राणापानौ निमेषाद्या जीवनं मनसो गतिरिन्द्रियान्तरसञ्चारः प्रेरणं धारणं देशान्तरगतिः स्वप्ने, पञ्चत्वग्रहणं दक्षिणेनाक्ष्णा दृष्टस्य सव्येनावगमश्च । तथेच्छा द्वेषः सुखं दुःखं प्रयत्नश्चेतना धृतिर्बुद्धिः स्मृतिरहङ्कारश्च । परमात्मनः सद्भाव-**

ज्ञापकानि लिङ्गानि नाम लक्षणानि (चशा. १.७२) आत्म्याच्या अस्तित्वाची दर्शक चिन्हे, प्राण, अपान, ( उच्छ्वासनिःश्वास ), डोळ्याची उघडझाप, जीवन, मनाची गति, निरनिराळ्या इंद्रियात संचार, मनाची प्रेरणा, धारणा, स्वप्नात अन्य देशात जाणे, मरणज्ञान, उजव्या डोळ्याने पाहिलेले डाव्याने ओळखणे, तसेच इच्छा, द्वेष, सुख, दुःख, प्रयत्न, चेतना, धृति, बुद्धि, स्मृति व अहंकार ही होत.

**परमान्न**–न., **उत्तममन्नम्, पक्वान्नम्** (चचि. ३०.२३४) उत्तम अन्न. पक्वान्न.
न., आहारद्रव्य० **पायसः** ( चक्र. चचि. १४.९ चवि. ७.१२ ) खीर, दुधाचा पदार्थ.

**परमेष्ठिनी**–स्त्री., वनस्पति० **ब्राह्मी** ( रा. ५.१४९ ) ब्राह्मी.

**परमौषध**–न., **श्रेष्ठं भेषजम्** ( असंसू. १.४८ ) श्रेष्ठ औषध.

**परम्परा**–स्त्री., **पङ्क्तिः** ( सुसू. २९.६ ) पंक्ति, रांग, ओळ, क्रम.

**परस्परानुग्रह**–पु., **अन्योन्यसाहाय्यम्** ( सुशा. ३.३ ) अन्योन्यांचे साहाय्य. एकमेकांचे सहाय्य.

**परस्परानुप्रवेश**–पु., **परस्परसंसर्गः, यथा भूजलानलवाय्वाकाशानां भूतानामन्योन्यमनुप्रवेशः** ( सुशा. ३.३ ) परस्परात मिस ळणे. पृथ्वी इत्यादी महाभूतांचा परस्परात प्रवेश.

**परस्परोपकार**–पु., **परस्परं साहाय्यम् । यथा–भूतानामाकाशादीनामवकाशदानादिभिः** ( सुशा. ३.३ ) परस्परांचे साहाय्य. आकाशादि भूतांचे अवकाश देणे इत्यादि साहाय्य.

**पराक्पुष्पी**–स्त्री., वनस्पति० **अपामार्गः** ( ध. १.२६१ ) आघाडा.

**पराक्रम**–पु., **सञ्चारः** ( चसू. ५.१०० ) संचार.
**शौर्याख्यं मानसं बलम्** ( चक्र. चसू. ११.३ ) पराक्रम. मनाचे शौर्य हे बळ होय.

**पराग**–न., वनस्पति० **पद्मकेसरम्** ( रा. १०.२६२ ) कमळकेशर.
**–पुष्प**–पु., वनस्पति० **कदम्बभेदः, धूलीकदम्बः,** (रा. ९.१७३) द्र० 'कदम्ब' कळंबाचा प्रकार.

**पराघातन**–न., **वधस्थानम्, इदमन्नाश्रद्धाजननानां श्रेष्ठम्** ( चसू. २५.४० ) वधस्थान, फाशीची जागा. ही पहाणे अन्नावरची इच्छा नाहीशी करण्यात श्रेष्ठ.

**पराचीन**–वि., **दूरप्रविष्टम्** ( सुसू. २७.७; सुचि. ८.४; अहसू. २८.१९ ) दूर प्रविष्ट झालेले.

**पराधिकार**–पु., **परस्य परेषां वा विषयः** (चचि.२६.१३१) दुसऱ्याचा विषय. दुसऱ्याचे क्षेत्र.

**पराभव**–पु., **अपयशः, मृत्युः** ( चइ. १२.१८ ) अपयश, पराभव.

**पराभिसन्धान**–न., **परपक्षप्रतिबन्धः** ( असंशा.५.२१ ) दुसऱ्या पक्षाला प्रतिबंध. अडवणूक.

**परामर्श**–पु., **ग्रहणम्** ( असंसू. ९.१३७ ) घेणे, धरणे, ओढणे.

**परायण**–न., **परमश्रेष्ठं स्थानम्, परमाधारः, परं अयनं श्रेष्ठं भेषजम्** ( चचि.२६.२१४ ) अतिश्रेष्ठ औषध.

**परार्ध**–न., **तुल्यप्रमाणचन्दनकुङ्कुममेलनम् । चन्दनं कुङ्कुमं तुल्यं परार्धमभिधीयते** ( ध.७.४४ ) चंदन व केशर यांचे समभाग मिश्रण.

**परार्ध्य**–न., **श्रेष्ठम्** ( सुचि. ६.१३ ) श्रेष्ठ.
**उत्कृष्टम्** (ड. सुउ. ६४.४२) उत्कृष्ट, फार चांगले.

**परावर**–न., वनस्पति० **परूषकम्** (ध. ५.६२) फालसा.

**परावरदृश्**–वि., **परं आत्मानं अवराणि आत्मव्यतिरिक्तानि प्रवृत्त्यादीनि, यः पश्यति तस्य परावरदृशः** ( चशा. ५.२० ) जगाला आत्मभावाने पाहणारा व आपल्यामध्ये जग पाहणारा.

**परावरान्तर**–न., **प्रतिभादौ आत्मनः प्रतिवादिनश्च श्रेष्ठकनिष्ठभावः** ( चवि. ८.१८ ) प्रतिभा इत्यादींच्या दृष्टीने आपण व प्रतिवादी यातला श्रेष्ठ कनिष्ठ भाव.

**पराशर**–पु., **पुनर्वसोरात्रेयस्य शिष्यः तन्त्रकर्ताऽसौ** ( चसू. १.३१ ) पुनर्वसु ( आत्रेय ) ऋषीचा शिष्य. एक ग्रंथकर्ता.

**पराश्रय**–पु., वनस्पति० **अतिमुक्तकः** ( ध. ५.१५३ ) कस्तुरमोगरा.

**परासु**–वि., **मृतः** (चइ. ३.५; सुसू. ३१.३ ) मृत.

**परिकर्तन**–न., लक्षण० **कृन्तनवद् वेदना** ( सुउ. ५५.८; सुनि. २.८ ) वेदना. कातरल्यासारखी वेदना.

**परिकर्तिका**–स्त्री., लक्षण० **परि सर्वतोभावेन कृन्ततीव छिनत्तीव वेदना** ( ड. सुचि. ३४.१६ ) **विशिष्टदेशव्यवस्थितवातवेदना परिकृन्ततीव गुदम् जेज्जट** ( चचि. ३.१८६ )

सर्व बाजूने कातरल्यासारखी, तोडल्यासारखी वेदना. विशिष्टभागातील वात वेदना. गुदमार्गात कातरल्यासारखी वेदना.

**रोग० शूलयुक्तं कर्तनं यस्मिन् सः**
( का. गर्भिणीचि. ) ( असंशा. ११.३ )
एक रोग. शूलयुक्त कातरल्यासारखी पीडा ज्यात होते तो रोग.

**परिकर्मिन्**–वि., **परिचारकः सूपकारादिः** ( सुचि. ६.४; सुक. १.१४-१६ ) परिचारक. स्वयंपाकी इत्यादी.

**परिकीर्ण**–वि., **लिप्तम्** ( चइ. ३.६ ) लिप्त. लपेटलेले.

**परिकोथन**–न., **परितः शातनम्, पूतीभावः** ( अहसू. ७.९ ) भोवताली कुजलेले, कुजणे.

**परिकोपक**–वि., **परिकोपं कुर्वाणः** ( चवि. ८.१४७ )
परिकोप करणारा, क्रुद्ध करणारा.

**परिक्रमण**–न., **चङ्क्रमणम्, गतागतम्, सर्वतो भ्रमणम्** ( सुचि. ११.११ )
सर्व बाजूनी—सर्वत्र भ्रमण. चालणे, जाणे येणे.

**परिक्लिन्नवर्त्मन्**–न., **नेत्ररोग० द्र० 'क्लिन्नवर्त्मन्,' प्रक्लिन्नवर्त्म, श्लेष्मजोऽयं साध्यश्च** ( सुउ. १.३५ )
ओल्या राहणाऱ्या पापण्या. हा साध्य असा कफज रोग आहे.

**परिक्लिष्ट**–वि., **लक्षण० अत्यर्थमवसन्नः, क्रियारहितः, समन्ततो भावेन क्लेशमुपगतः** ( ड. सुउ. ५५.१८ )
अतिशय गळालेला, क्रियारहित. सर्वबाजूंनी जिकिरीला आलेला.

**परिक्षिप्त**–वि., **वेष्टितम्** ( सुचि. ६.४ ) वेष्टिलेले.

**परिक्षीण**–वि., **सर्वतः क्षीणम्** ( सुचि. ५.३९ )
सर्वबाजूंनी क्षीण झालेले.

**परिक्षेप**–पु., **परिणाहः** ( चवि. ८.११७ ) घेर, विस्तार.

**परिक्षेपिक**–वि., **प्रतिक्षेपिकशब्दः, प्रतिक्षेपिको नाम प्रतिवादी शब्दः संज्ञा यस्य सः, प्रतिवादी इति यावत् । यस्य वादे निग्रहादिः सञ्जातः, सः** ( चक. ) (चवि. ८.२०) वादामध्ये ज्याचा पराभव झाला तो. **प्रतिवादी** ( चवि. ८.२० ) प्रतिवादी.

**परिक्षेपिन्**–पु., **रोग० भगन्दरभेदः, वातपित्तजोऽयम्, प्राकारस्य परितः परिखेव गुदं परिक्षिप्य गुदस्य परितो मण्डलाकृतिर्नाडी जायते** ( असंउ. ३७ )
भगंदराचा प्रकार. हा वातपित्तजरोग. किल्ल्याच्या तटाभोवती खंदक असावा तसे गुदाच्या भोवती गोल आकाराचा नाडीव्रण होणे.

**परिगीत**–न., **गीतम्, गायनम्** ( सुउ. ६०.१० )
गायन, गीत, गाणे.

**परिग्रह**–पु., **ममता** ( चवि. ३.२४ ) ममता, आसक्ती.
**आहारद्रव्याणामेकैकश्येन प्रमाणग्रहणम्** ( चवि. १.२२(४)
आहारद्रव्यांपैकी एकेकाचे प्रमाण घेणे.
**शारीर० शिश्ने स्फीतदेश इति गङ्गाधरः, लिङ्गस्याग्रिमवर्तुलाकृतिभागः** ( चचि. ३०.१७० )
लिंगाचा जाड भाग, लिंगाच्या टोकाचा गोल भाग. मणी.

**परिघ**–पु., **अर्गलादण्डः** ( सुचि. १५.९ )
दाराच्या अडसराचा दांडा.
**रोग० मूढगर्भेष्वेकः, परिघ इव योनिमुखमावृत्य तिष्ठत्येतादृशो गर्भः** ( सुनि. ८.४ )
अडलेल्या गर्भाचा प्रकार. अडसरासारखा योनीचे तोंड व्यापून रुतलेला अडकलेला गर्भ.

**परिघट्टन**–न., **परिचालनम्** ( असंसू. ३८.३१ )
सर्व बाजूंनी हालणे, हालवणे.

**परिघट्टित**–वि., **समन्ततश्चालितम्** ( सुउ. १५.४ )
भोवताली चाळविलेले चोळलेले.

**परिचर**–पु., **परिचारकः** ( सुसू. ३४.२४ )
परिचारक, रोग्याची शुश्रूषा करणारा.

**परिचारक**–पु., **चिकित्सापादः, शुश्रूषकः पुरुषः** ( सुसू. ३४.१५ ) **प्रेष्यः कर्मकरः** ( ड. ) ( सुउ. ६०.२२ ) **तल्लक्षणम्– स्निग्धोऽजुगुप्सुर्बलवान् व्याधितरक्षणे युक्तो वैद्यवाक्यकृदश्रान्तश्च** ( सुसू. ३४.२४ ) **अनुरक्तः शुचिर्दक्षो बुद्धिमांश्च** ( अहसू. १.२९ ) **सोद्यमः शुचिः शूरो बलिष्ठश्च** ( र. ७. २७ )
परिचारक. रोग्याची शुश्रूषा करणारा. **लक्षण**—तो कनवाळू, कंटाळा न करणारा, बलवान्, रोग्याचे रक्षण करण्यास समर्थ, वैद्याच्या आदेशाप्रमाणे वागणारा, न थकणारा, रोग्यावर प्रेम करणारा, शुचिर्भूत, कोणत्याही वेळी सेवेला तयार असणारा, बुद्धिमान, शूर, उद्योगी असावा.

**परिच्छद्**–पु., **आसनोपरिस्थितं वस्त्रम्** ( चसू. १४.५७ )
आसनावर घातलेले वस्त्र. चादर, पलंगपोस.
**साधनसामग्री** ( सुशा. १०.५ )
साधनसामुग्री.

वेषः, परिच्छाद्यते शरीरमनेनेति परिच्छदो वेषः ( चशा. ८.१४ ) वेष, पोषाख.

**परिच्छेद**–पु., **विश्लेषः, पृथक्त्वम्** ( सुसू. २४.११ ) वेगळा, निराळा, निराळेपण.

**परिजाड्य**–वि., **स्तिमितम्, परिपूर्णं जाड्यं स्तैमित्यं यस्मिंस्तत्** ( सुउ. ७.२२ ). संपूर्ण जडत्व. जडपणा ज्यात आहे ते. अचल.

**परिजारण**–न., **पारदसंस्कार० जारणा, गालनपातनव्यतिरेकेणाभ्रकस्वर्णादीनां ग्रासं दत्वा पूर्वावस्थापादनम्** ( र. १.२८ ) पाऱ्यावरचा एक संस्कार, जारणा–अभ्रक व सुवर्ण इत्यादींचा ग्रास ( ह्रै ) देऊन पारा न गाळता किंवा ऊर्ध्वपातन न करता पाऱ्याला पूर्वावस्था प्राप्त करणारा संस्कार.

**परिजिहीर्षा**–( परिव० ) स्त्री., **परिहर्तुमिच्छा** ( सुचि. ३७.५१ ) त्यागाची इच्छा, टाकण्याची इच्छा.

**परिजीर्ण**–वि., **पुरातनम्** ( सुसू. ४६.२९७ ) जुने, फार काळाचे, फार पूर्वीचे.

**परिणतवीर्य**–वि., **कालपरिणामेन सञ्जातशक्तिकम्** ( सुसू. ६.११ ) काळाच्या परिणामाने ज्याच्यात शक्ति निर्माण झाली आहे. परिपक्व विकसित शक्तीचा.

**परिणाम**–पु., **कालः** ( चनि. १.३; असंसू. २२.१३ ) काळ.
**परिपाकः** ( चवि.५.३ ) परिपाक. व्यवस्थित पचन.
**पचनम्, परिणतिः** ( अहसू. ९.२०; चशा.६.१४ ) पचन, परिणति.
**भिन्नजातीयैरनेकैरेकीभावेन कार्यस्यारम्भः** (ड. सुक. ८.४) भिन्नजातीय अनेकांच्या एकीकरणाने कार्याचा आरंभ.
**साङ्ख्यानां मूलप्रकृतिः प्रधानसंज्ञका** (सुशा.१.११) सांख्यांची मूळप्रकृति. प्रधान.

**–काल**–पु., **कालपरिणामः** ( चशा.२.४० ) काळाचा परिणाम.

**–वती**–स्त्री., **हिध्माविशेषः यमला** ( असंनि.४. ) उचकीचा विशेष, यमला.

**–शूल**–( परिव० )–पु., **रोग० शूलभेदः, भुक्तान्नपचनसमये जायमानः शूलः** ( र. ३.१४७ ) शूलाचा प्रकार, खाल्लेले अन्न पचनाच्या वेळी होणारा शूळ.

**परिणामोन्मुख**–वि., **पच्यमानम्** ( असंनि. ४.२२ ) पचत असलेले, परिपक्व होण्याच्या बेतात असलेले.

**परिणाह**–पु., **विस्तारः** ( चवि.७.१२; सुचि.३५.७ ) विस्तार, घेर,
**परिघः** (सुचि. ४०.४; असंशा. ८.३०) घेर, परिघ.

**परितमन**–(परिव०)–न., **लक्षण० मोहः** (सुउ.४१.२५) मूर्च्छा. घेरी.

**परितोष**–पु., **परितुष्टिः** ( सुसू.४२.९ ) परितुष्टि, संतोष.

**परिदग्ध**–वि., **समन्ततो दग्धम्** ( असंनि. २.२६ ) भोवताली जळालेले.

**परिदर**–पु., **रोग० दन्तमूलगतः, पित्तासृक्कफजोऽयम्, तल्लक्षणम्–अस्मिन् दन्तमांसानि शीर्यन्ते रक्तनिष्ठीवनं च भवति** ( सुनि. १६.२१ ) दाताच्या मुळातला रोग. पित्तकफरक्तज. यात दाताच्या हिरड्या झरतात व रक्तस्राव होतो म्हणून रक्ताची थुंकी येते.

**परिदाह**–पु., **लक्षण० समन्ततो ज्वलनवत् पीडा** ( चनि. ४.४७; सुसू. २१.३२ ) भोवताली जळते आहे अशी वेदना.

**परिदृष्टकर्मन्**–वि., **दृष्टं चिकित्साकर्म येन तादृशः** (चवि. ८.४ ) अनेक उपचार करताना ज्याने पाहिले आहेत असा. दृष्टकर्मा.

**परिदेवन**–( परिव० ) न., **शोकः** ( असंउ. ९ ) शोक.

**परिदेविन्**–वि., **शोकाकुलः, वेदनायुक्तः** ( असंनि. ४.१६ ) शोकाकुल, वेदनायुक्त.

**परिधि**–पु., **हस्तप्रमाणः होमकुण्डचतुःपार्श्वे स्थाप्यः पालाशादिदण्डः** ( चवि. ८.९ ) **स्थण्डिलपरितः समिध्** ( चशा. ८.११ ) होमकुंडांच्या चारी बाजूंना पळस इ० चा दंड किंवा ठेवलेली समिधा.

**परिधूपन**–न., **लक्षण० सर्वाङ्गसन्तापः** (ड. सुक. ४.३७) सर्वांगसंताप, सर्वांगाची आग.

**परिध्वस्त**–वि. **नष्टम्** (चइ. ९.३) नष्ट. नाहीसे झालेले.

**परिपक्व**–वि., **समन्ततः पक्वम्** ( चशा. ६.१७ ) भोवताली पिकलेले.
**पाकात् पूयतां गतम्** ( चशा. ६.१७ ) पिकल्याने पू झालेले, पिकलेले.

**–गर्भशल्या**–स्त्री., **परिपक्वं गर्भरूपं शल्यं यस्याःसा** ( चशा. ८.३१ ) जिची गर्भरूपी सलणारी वस्तु परिपक्व झाली ती.

नऊ ते दहा महिन्यांचा गर्भ जिच्या पोटात आहे व अजून बाहेर येत नाही म्हणून शल्यभूत झाला आहे ती.

**-शरीरत्व**–न., **वृद्धत्वम्** ( सुसू. १४.१९ ) परिपक्व-पिकलेल्या शरिराचा भाव म्हातारपण वार्धक्य.

**परिपचन**–न., **पात्र० तैलपाचनिका** ( चसू. १५.७ ) तेल पचन करण्याचे भांडे.

**परिपाक**–पु., **पचनम्**, (चचि. ३.२८ ) पचन, पचणे. **जरणम्** (सुसू. ४६.५१०;) जिरणे.

**परिपाटन**–( परिव० ) न., **किञ्चिदवदारणम् त्वग्गात्र-विदारणम्**, ( सुनि. १६.५ ) किंचित् फाडणे, फाटणे; त्वचा फाडणे, कातडीला चीर पडणे.

**परिपालन**–( परिव० ) न., **रक्षणम्** ( सुचि. ३३.३ ) रक्षण, परिपालन, पालन.

**परिपिष्टक**–न., **खनिज० सीसकम्** (रा. १३.२०) शिसे.

**परिपीडन**–न., ( परिव० ) **उपक्रम० समन्तादौषधैः पचनम्** ( सुचि. १.४६ ) बाजूने दाबणे. व्रणाच्या बाजूला औषधांनी दाबणे.

**परिपीत**–वि., **भावितम्** ( चचि. १.५८; सुचि. १०.४ ) भावना दिलेले, औषधांचा रस प्यालेले चूर्ण.

**परिपुटन**–न., **त्वच उच्चटनम्** ( सुसू. १६.१७ ) त्वचा सोलली जाणे.

**परिपूत**–वि., **शुद्धम्** ( सुचि. २५.२६ ) शुध्द.

**परिपूर्णशरीर**–वि., **सर्वाङ्गोपचितदेहः** ( चशा. ३३ ) सर्व घटकांची वाढ व विकास पूर्ण झालेले शरीर. सर्व अंगोपांगे पुष्ट झालेले शरीर.

**परिपेलव**–न., **वनस्पति० कैवर्तमुस्तकम्** ( चक्र. चक. १.२३; ड.सुक. २.५१ ) नागरमोथा.

**परिपेलवगुणाः– कटूष्णं मेध्यं कान्तिप्रदं वातकफघ्नं. प्रस्वेदमलकण्डूव्रणदाहामशूलरक्तदोषघ्नं च** ( ध. ३.५६; अहृसू. १५.२६ )

हिं.—केवडीमोथा.

**म.—केवटीमोथा.**

गु.—केवडीमोंथ.

बं.—केउटमुथा.

त.—नीर्मुत्तकाचु.

**गुण**—तिखट, उष्ण, धारणाशक्ति वाढविणारा, कांतिवर्धक, वातकफनाशक, खूप घाम येणे, मळ, खाज, व्रण, दाह, आमशूल, रक्तदोष नाशक.

**वन्यकः** ( सुउ. ४७.३१ ) नागरमोथा.

**जलमुस्तम्** ( असंक. १; ध. १.४३ ) पाण्यातील नागरमोथा.

**परिपेल्ल**–न., **वनस्पति० परिपेलवम्** ( अहृसू. १५.२६; ध. ३.५५ ) नागरमोथा.

**परिपोट**–पु., **चर्मदरणम्** ( इन्दु. असंउ. २१ ) त्वचा फाटणे; कातडीला चिरण्या पडणे.

**रोग० कर्णपाल्यां जायमानः, तल्लक्षणम्–वातात् सुकुमारे कर्णे बहुकालोपेक्षया सहसैव प्रवर्धिते सति पाल्यां सरुक् परिपोटवानरुणः स्तब्धः शोफो भवति** ( सुचि. २५.५; असंउ. २१ )

कानाच्या पाळीचा रोग. **लक्षण**–वातामुळे नाजुक कानाची उपेक्षा पुष्कळ काळ करून तो वाढविण्याचे उपचार केल्याने पाळीवर वेदनायुक्त कातडीला चिरण्या व तांबुस दडस सूज येते.

न., **पुटकम्** ( असंउ. ३४ ) कर्णपालीरोग.

**परिपोटन**–न., **लक्षण० सर्वतस्त्वच उच्चटनम् उच्चटनवद्वा वेदनाविशेषः** ( सुनि. १.२५ ) सर्व बाजूने त्वचा वर उचलून येणे किंवा उचकटल्याप्रमाणे वेदना होणे.

**परिप्रश्न**–पु., **प्रश्नः, आशङ्का** ( चसू. ३०.८७ ) प्रश्न, शंका ( विचारणे )

**परिप्लव**–पु., **नक्षत्रादीनां गतिः** ( सुउ. ७.९ ) नक्षत्र, ग्रह यांची गति.

**परिप्लवन**–( परिव० ) न., **इतस्ततो गमनम्** ( चक्र. चक १.५ ) इकडे तिकडे फिरणे, जाणे.

**परिप्लुत**–वि., **रोग० रक्तगुल्मस्य प्रच्युते शोणिते सति जायमानाऽवस्था** ( काखिल. ९.३७ ) रक्तगुल्माचा रक्तस्राव झाल्यावरची अवस्था.

**( परिप्लुता )**–स्त्री., **योनिरोग० नीलपीतासृक्स्रावान्नाम तादृशशोणितपरिप्लुताद् परिप्लुतेति सुष्ठूक्तम्। पित्तलायाः पुंसङ्गतौ क्षवथूद्गारयोर्धारणात् पित्त-युक्तेन मरुता दूषिता योनिः शूना स्पर्शासहा सार्तिर्नीलपीतास्रवाहिनी श्रोणिवंक्षणरुक्तोदज्वरकृत्** ( चचि. ३०.२३-२४ ) **बस्तिकुक्षिगुरुत्वाति-साराऽरोचककारिणी च भवति** ( असंउ. ३८ )

पित्त दोषाने दुष्ट योनीच्या स्त्रीने संभोगाचे वेळी शिंक किंवा ढेकर आली असता ती अडवल्यास पित्तयुक्त वाताने योनि दूषित होऊन तिला सूज,

स्पर्श सहन न होणे, वेदनायुक्त निळसर पिवळसर स्राव, व रक्ताचा स्राव, कंबर, जांघ यात वेदना टोचणी होते. बस्ति व कूस ही जड होतात, अतिसार, अरुचि, व ताप उत्पन्न होतात.

**परिबर्ह**–पु., सामग्री, शयनासनपुष्पादिपरिच्छदः ( चशा. ८.१२ )
सामुग्री. आसन; झोपण्याची साधने फुले इत्यादी वस्त्रे भूषणे.

**परिबृंहण**–न., समन्ततो वर्धनम्, अतिशयेन बृहत्त्वं परिपुष्टिर्वा ( चसि. ३.२७ )
सर्व अवयवांना पौष्टिक होणे, सर्व अवयवांची सर्व बाजूंनी वाढ होणे, अतिपौष्टिक, परिपुष्टि.

**परिभव**–पु., रोग० बालरोगः पारिगर्भिकः ( असंउ. २ )
पारिगर्भिक. पहा 'पारिगर्भिक'.

**परिभूत**–वि., परिभवाख्यरोगयुक्तः ( इन्दु. असंउ. २ )
परिभव रोग युक्त. परिगर्भिक रोग युक्त.
असाध्यः ( काखिल. १३.२९ ) असाध्य.

**परिमण्डल**–पु., कीट० मशकभेदः सामुद्रकृष्ण-पार्वतीयादिपञ्चानामेकतमोऽयं, तद्दष्टस्य तीव्रा कण्डूर्दंशशोफश्च भवति । नखावकृष्टेऽत्यर्थं पिडका-दाहपाका भवन्ति ( सुक.८.३६ )
किडा. सामुद्र, कृष्ण, पार्वतीय इ. पाच प्रकारांपैकी डासाचा एक प्रकार. तो डसल्याने तीव्र खाज आणि सूज येते. नखाने खाजवले तर अतिशय पुळ्या व आग होते व त्या पिकतात.
न., वनस्पति० परूषकम् ( ध.५.६२ ) फालसा.
वि., वर्तुलम् परिपूर्णं मण्डलं ( सुनि.१३.६ ) वर्तुळ. संपूर्ण वर्तुळ, गोल गरगरित.

**–मध्यास्थि**–न., वनस्पति० परूषकम् ( ध.५.६२ )
फालसा.

**परिमर्दन**–न., मर्दनं, घर्षणम् ( र.२.७६ )
चोळणे. घासणे.

**परिमर्शनीय**–वि., अध्याय० परिमर्शमरिष्टज्ञापकस्पर्श-मधिकृत्य कृत इति परिमर्शनीयः ( चइ.३.१ )
अध्यायाचे नाव. स्पर्शाने जे मरणसूचक चिन्हांचे ज्ञान होते ते या अध्यायात आहे.

**परिमाण**–न., मानम् ( चसू.२६.२९ ) माप, वजन.
परिमीयतेऽनेनेति ( सुचि.३१.८ )
ज्याच्याने मोजले जाते ते, माप, वजन.
सङ्ख्या परिमीयते संख्यायते इति परिमाणं संख्या परिच्छेदो वा ( चशा.७.१४ ) संख्या.

**–विशारद**–वि., परिमाणं यथावज्ज्ञानिनः ( चक.१२.९७ )
ज्यांना वजने मापे यांचे ज्ञान असते ते.

**परिमार्गण**–(परिव०) न., मार्गणम् गवेषणम् ( सुचि. ३०.४० )
शोधणे, संशोधन, अन्वेषण. तपास करणे.

**परिमार्जन**–न., उद्वर्तनम् ( चसू. ५.९३ ) उटणे.

**परिमिताहार**–वि., अनिषिद्धाशनं भुञ्जानः, निषिद्धाशन वर्जनपूर्वकं युक्ताहारसेवी ( ड. सुउ. ५६.५ )
खाण्यास अयोग्य. आहार वर्ज्य करून योग्य आहार सेवन करणारा.

**परिमृष्ट**–वि., निर्मलम्, शुद्धम् ( असंसू. ३.८ )
निर्मळ, शुद्ध.

**परिम्लान**–वि., क्षीणकायः ( चचि. ५.३८ )
क्षीण शरिराचा. थकलेला.

**परिम्लायिन्**–पु., न., नेत्ररोग० पैत्तिकोऽयम् ( सुउ. १.३२ ) अरागप्राप्तस्य तिमिरस्य परिम्लायीति संज्ञा ( सुउ. ७.२५ ) रक्ततेजसा मूर्च्छितं पित्तं परिम्लायि तिमिरं करोति । तस्मिन् रुग्णो दिशः पीताः पश्यति। तथोद्यन्तमादित्यमिव च खद्योतैस्तेजोभिर्विकीर्यमाणान् वृक्षांश्च पश्यति ( सुउ. ७.२५-२६ )
हा पित्तदोषाचा डोळ्याचा रोग. ज्या दृष्टिरोगात दृष्टि रंगीत दिसत नाही तो. दुष्ट रक्ताने पित्त दूषित होऊन हा रोग होतो. त्यात रोग्याला सर्व दिशा पिवळ्या दिसतात, उगवणाऱ्या सूर्याप्रमाणे, काजव्याच्या तेजाप्रमाणे तेज बिखुरलेले असे वृक्ष पहातो.

**( परिम्लायि )–त्व**–न., शुष्कता ( सुसू. ३२.४ )
शुष्कता, सुकलेले असणे.

**परिरक्षण**–न., सर्वतो रक्षणम्, ( सुसू. १५.६ )
सर्व बाजूंनी रक्षण करणे.

**परिरक्षा**–स्त्री., सर्वतो रक्षणम्, समन्ततः संरक्षणम् ( अहसू. २५.२ )
सर्व तऱ्हेने रक्षण करणे, भोवताली रक्षण करणे.

**परिलेहिन्**–पु., रोग० कर्णपाल्यां जायमानः, तल्लक्षणं–कफासृक्कृमयः पाल्यां सर्षपाभा विकारिणीः स्राविणीः कण्डूदाहरुगन्विताः पिडकाः कुर्युः । कफासृक्कृमिसम्भूतोऽसौ व्याधिरितस्ततो विसर्पन् सशष्कुलीका पालीं लिह्यात् ( सुचि. २५.१०–११ )
कानाच्या पाळीला होणारा. कफ, रक्त, कृमि, पाळीत

मोहरीसारख्या स्राव होणाऱ्या खाज दाह व वेदना होत असलेल्या पुळ्या करतात. हा रोग इकडे तिकडे पसरून पाळीवरील वळ्यांसह पाळी खातो.

**परिवर्तन**–न., **स्वरूपान्तरम्, अन्यथाभवनम्** ( चचि. १५.२१ )
स्वतःचे रूपांतर निराळे होणे. एका धातूचे दुसऱ्या धातूत रूपांतर होणे.
**विलोटनम्. पार्श्वपरिवर्तनमिति हाराणचन्द्रः** ( सुसू. १९.११ )
या कुशीवरून त्या कुशीवर वळणे.

**परिवर्तिका**–स्त्री., **क्षुद्ररोग० मेढ्चर्मणः प्रतिनिवर्तनस्वरूपोऽयम् । तल्लक्षणम्–मणेरधस्तात् कोशो ग्रन्थिरूपेण लम्बते। सवेदनदाहोऽसौ क्वचित्पाकं व्रजति। मारुतागन्तुसम्भूता सा परिवर्तिका सरुजा, श्लेष्मसमुत्थिता तु कण्डूमती कठिना स्निग्धा च** ( सुनि. १३.४७-५० ) **सङ्ग्रहे त्वस्या नाम 'निवृत्तचर्म' इति** ( असंउ. ३८ )
शिश्नाच्या मण्यावरची कातडी उलटी होऊन सुजणे. **लक्षण**—मण्याच्या खाली सुजलेल्या कातडीची गाठ होते व ती लंबकासारखी लोंबते. गाठीत वेदना दाह होतो. केव्हा पिकते ही. वाताधिक्याने वेदना, कफामुळे खाज, सूज, कठिणता व स्निग्धता असते. या रोगाला निवृत्तचर्म असे ही म्हणतात.

**परिवाद**–पु., **दोषकथनम् तज्जन्या निन्दा वा** ( सुचि., २४.९० )
दोष सांगणे, बोलणे. तज्जन्य निंदा.

**परिवापन**–न., **संस्कार० अग्नौ तापयित्वा द्रावे पातयित्वा निर्वापणम्** ( र. २.३८ )
धातु अग्नीत तापवून काढ्यात टाकून विझविणे.

**परिवार**–पु., **सेवकजनः** ( असंसू. २८.२९ )
सेवकलोक. कुटुंबातील माणसे.

**परिविस्तर**–पु., **विस्तारः** ( सुशा. ६.२९ ) विस्तार.

**परिवीजन**–( परिव०., ) न., **परितः वीजनम्** ( सुशा. १०.२३ ) वारा घालणे. सर्वबाजूंनी वारा घालणे.

**परिवृत्तगर्भा**–स्त्री., **परिवृत्तोऽवाक् परिवृत्तो गर्भो यस्याः सा। तल्लक्षणम्–गर्भो हृदयं विमुच्योदरमाविशति बस्तिशिरोऽवगृह्णाति। आव्यश्चैनां त्वरयन्ति** ( असंशा. ३.२१) **अस्यामवस्थायां प्रवाहणनियमानुरूपमुपक्रमेत** (असंशा. ३.२४)
ज्या गर्भिणीचा गर्भ प्रसूतीच्या वेळी खाली कटीत गेला आहे ती. त्यावेळची स्थिति–हृदयप्रदेशापर्यंत असलेला गर्भ तो प्रदेश सोडून उदरात येतो व बस्तीच्या डोक्याजवळ येऊन थांबतो, नंतर वेणा त्या गर्भाला खाली नेण्याकरिता वेगाने सुरू होतात, यावेळी कुंथण्याच्या नियमाप्रमाणे कुंथावे.

**परिवृत्ति**–स्त्री., **क्षुद्ररोग० परिवर्तिका** ( सुचि. २०.४० )
शिश्नाचा एक क्षुल्लक रोग. पहा 'परिवर्तिका'.

**परिवेशक**–वि., **अन्नादेः परिवेषणे नियुक्तः सेवकः** (चनि. ६.१३) अन्न वाढणारा. वाढपी.

**परिव्याध**–पु., **वनस्पति० वानीरः**, ( रा. परि. ९.१७ )
जलवेतस.
**कर्णिकारः** ( ध. १.२२१; रा. ९.३३६ ) बहावा.
**जलवेतसः** ( इन्दु. असंशा. ४.२५; चशा. ८.२९ )
जलवेतस.

**परिव्राजी**–स्त्री , **वनस्पति० मुण्डी** ( ध. १.१५९ )
मुंडी, गोरखमुंडी.

**परिशुद्ध**–वि., **समन्तान्निर्मलम्** ( सुचि. ३१.५६ )
भोवताली निर्मल. कोठ्याच्या भोवतालचे सर्व शरीरातलेहि दोष शुद्ध झालेला.
**–काय**–वि., **स्नेहस्वेदपूर्वकवमनादिभिर्विशुद्धशरीरः** ( सुचि. २५.३५ ) स्नेहन घाम इत्यादी कर्मे करून वांती, रेच इत्यादींनी शुद्ध झालेला.
**–कोष्ठ**–वि., **निर्दोषोदरः** ( ड. सुचि. ३१.५६ )
निर्दोष–शुद्ध पोट असलेला. शुद्ध कोठ्याचा.

**परिशुष्क**–वि., **आर्द्रतारहितम्** ( सुशा. ८.१९; सुसू. ४६.३५३) सुकलेला. ओलावा नसलेला.

**परिशोधन**–न., **वमनविरेचनबस्त्यादिना कोष्ठशोधनम्** ( र. ५.५२ )
वांती, रेच, बस्ति, इत्यादींनी कोठा शुद्ध करणे.

**परिषद्**–स्त्री., **सभा, विद्वत्समूहः, सा द्विविधा ज्ञानवती मूढपरिषच्च, द्विविधाऽपि कारणविभागेन पुनस्त्रिविधा, सुहृदुदासीनप्रतिनिविष्टभेदात्** (चवि. ८.२०)
सभा. विद्वानांचा समुदाय सभेचे दोन प्रकार. ज्ञानवानांची व मूर्खांची. पुन्हा तीन प्रकार मित्रत्वाने, उदासीनतेने, व विपरीत ग्रहाने होणारी.

**परिषेक**–पु., **स्नानम्** ( सुचि. २९.१२ ) **धाराप्रसेकः** (सुउ. ३९.१५६)
स्नान, धारांचा वर्षाव. धारांचे सिंचन.

व्रणोपक्रमः परिसेचनम् ( सुचि. १.८; काखिल. १२.२४ )
व्रणाचा उपचार. द्रव औषध शिंपडणे.
स्वेद० तद्विधिः– वातिकोत्तरवातिकानां पुनर्मूलादीनामुत्काथैः सुखोष्णैः कुम्भीर्वर्षणिकाः प्रनाडीर्वा पूरयित्वा यथार्हसिद्धस्नेहाभ्यक्तगात्रं वस्त्रावच्छन्नं परिषेचयेत् ( चसू. १४.४४ )
द्रवसिंचनाने शेकणे. वात किंवा वाताधिक दोषात मुळांच्या बेताच्या उष्ण काढ्याने, तांब्या झारी किंवा अनेक धारांची झारी भरून, त्यांनी, रोग्याला अभ्यंग करून व बारीक कपडा अंगावर पांघरून त्यावर काढा शिंपावा. काढ्याची धार धरावी.

**परिष्कृत**–न., परिकल्पितम् संस्कृतम् (अहसू. १३.२९)
संस्कार केलेला. दीपन पाचन. स्नेहन, स्वेदन इत्यादी केलेला.

**परिसंवत्सर**–वि., अध्ययनं स्वयमुपसंस्कृत्य पुनरध्येता, ( चक्र. ) संवत्सरं परिप्राप्तः सांवत्सरिकाध्ययनं कर्तव्यतया प्राप्तः ( चवि. ८. २० )
अध्ययन केल्यानंतर पुन्हा स्वतः पठण करणारा, एक वर्ष अध्ययन केलेला.
वर्षोषितम् ( सुसू. ४६.३३८ ) वर्षातीतम् ( चचि. ११.१४ )
एक वर्षाचे जुने. वर्ष उलटलेले, वर्षभर ठेवलेले उपयोगात न आणलेले.

**परिसर**–पु., उपान्त्या भूः (सुचि. २९.१२)
काठाजवळची जमीन, सभोवतालचा भाग.

**परिसरण**–न., भ्रमणम् ( चनि. ७.७ ( १ )
भ्रमण, फिरणे.
लक्षण० कुण्डलरूपभ्रमणम् ( चवि. ६.१८ )
वाटोळे फिरणे, फुगड्या खेळणे, गिरकी घेणे.

**परिसर्प**–पु., सर्प० दर्वीकरभेदः ( सुक. ४.३४ ( १ )
नागाचा प्रकार.
रोग० विसर्पः, सर्वतः सर्पणात् परिसर्पः ( चचि. २१.११ ) तल्लक्षणम्–यस्मिन् रोगे शरीरे पिडकाः स्रवन्त्यः सत्यः शनैः सर्पन्ति स परिसर्पः ( सुनि. ५.१२ ) धावरे. सर्व बाजूंनी पसरतो म्हणून परिसर्प. ज्या रोगात पुळ्या पाझरतात व हळूहळू पसरत जातात असा रोग.

**परिसर्पण**–न., अङ्गादिषु प्रचालनम् ( चसू. १८.४ )
अंग प्रत्यंगावर चालणे.

**परिसर्पित**–वि., परिसर्परोगयुक्तः, कारण्डादिभिः स्पर्शविशेषैः परिसर्पितः (चक्र. चसू. २६.४३ (२) )
धावऱ्याने युक्त. करडुवापक्ष्याच्या स्पर्शाने पसरलेला.

**परिसिक्थिका**–स्त्री., तनु-पेया ( असंउ. ४९ )
पातळ पेज.

**परिसिक्थिक**–न., सिक्थोदकम् ( असंउ. ४९ )
भाताच्या शितांचे पाणी.

**परिसिद्धिका**–स्त्री., मण्डः ( काभोजनक. ५२ )
पेजेपेक्षा पातळ अन्नांश.

**परिस्रुता**–स्त्री., आसुत० सुरा ( रा. १४.३०२ )
दारू, सुरा नावाची दारू.

**परिस्पन्दन**–न., संचलनम् ( असंशा. ५.१० )
संचलन, थरथरणे. अंग उडणे.

**परिस्रव**–पु., नासारोग० तल्लक्षणम् अस्मिन् मस्तुलुङ्गाद् घनपीतपक्वः कफः स्रवति ( चचि. २६.११२; )
नाकाचा रोग. यात नाकाच्या मार्गाने दाट पिवळा पिकलेला कफ स्रवतो.

**परिस्राव**–पु., गालनम् ( अहसू. २८.१० ) गाळणे.
मलानामल्पाल्पशः सरणम् ( सुचि. ३४.१७ ) दौर्बल्योदरविष्टम्भारुचिगात्रसदनानि पित्तश्लेष्मणोः सवेदनं स्रवणं च ( सुचि. ३४.१७ )
मळ थोडा थोडा सरणे, पुनः पुनः पुळकणे. दुबळेपणा, पोट गच्च होणे, बेचव, अंग गळणे, पित्त व कफ वेदनायुक्त स्राव.

**परिस्राविन्**–वि., सर्वतः स्रोतुं शीलं यस्य तत् ( सुचि. ८.२३; असंसू. ३३ )
सर्व बाजूंनी स्रवण्याचा स्वभाव असलेले.

**(परिस्रावि)–भगन्दर**–पु., रोग० भगन्दरभेदः कफजोऽयं स्रावयोगात् परिस्रावी । तत्सम्प्राप्तिलक्षणे– वातेनाधः प्रेरितः श्लेष्मा भगे कण्डुमतीं पीटिकां जनयति । अप्रतिक्रियमाणा सा पाकमुपैति । व्रणश्च कण्डूप्रायः पिच्छिलमजस्रास्रावं स्रवति । उपेक्षितश्च वातमूत्रपुरीषरेतांसि विसृजति ( सुनि. ४.७; असंउ. ३३ )
भगंदराचा प्रकार. हा कफज. सारखा स्राव होतो म्हणून परिस्रावी. संप्राप्ति व लक्षणे-वाताने खाली नेलेला कफ भागावर-योनी किंवा गुदद्वारावर खाज असणारी पुळी उत्पन्न करतो. त्यासाठी उपचार न केल्याने ती पिकते, व्रणात खाज, बुळबुळीत व एक

सारखा स्राव होतो त्याची उपेक्षा केली तर वात-मूत्र, मळ, व वीर्यही त्यातून स्रवते.

**परिस्राव्युदर**–न., रोग० उदरभेदः, छिद्रोदरम् ( चसू. १९. ४ (१); असंनि. १२; अहनि. १२. ३२-३६ ) **क्षतान्त्रमुदरमिति गयी क्षतोदरमिति** ( मा. नि. ) **तल्लक्षणम्–नाभेरध उदरं वृद्धिमेति । अतीव निस्तुद्यते विदह्यते च छिद्रात् परितो यस्मिन्नुदरे स्रावो भवति । तस्मिन् जलोदरादप्याशुत्वेन जलसञ्चयो भवति** ( सुनि. ७.२० ) **असाध्यमिदम्** ( सुचि. १४.३ )
स्राव होणारे उदर. छिद्रोदर, क्षतोदर. नाभीच्या खाली पोट वाढते, अतिशय टोचते, व आग होते यात छिद्रातून उदरात सर्वबाजूने स्राव होतो व जलोदरापेक्षाही फार लवकर पाण्याचा संचय होतो. हा रोग असाध्य आहे.

**परिस्रुत**–वि., **गालितम्** ( सुउ. ५८.४६ ) गाळलेले.

**(परिस्रुता)**–स्त्री., **रेवतीग्रहः, तल्लक्षणम्–यस्याः कृशात्मनो नार्या योनिरभीक्ष्णं स्रवति सा परिस्रुता ज्ञेया** ( कारेवतीक. )
एक रेवतीग्रह. लक्षण हिने पछाडलेल्या कृश स्त्रीच्या योनीतून सतत स्राव होतो.

**परिस्रुति**–स्त्री., **स्रावः, पतनम्** ( चशा. २.१५ )
स्राव. पडणे.
**पिच्छिलजलस्रवणम्** ( इन्दु. असंउ. ३४ )
बुळबुळीत पाण्याचा स्राव होणे.

**परिहर्ष**–पु., **झिनझिनिका** ( चक्र. चनि. ५.७ )
झिणझिण होणे.
**परिहार**–पु., **त्यागः, वर्जनम्**, ( सुचि. २७.८ )
त्याग, वर्ज्य, सोडणे, टाकणे.
**तन्त्रयुक्तिः दोषवचनस्य परिहरणम्** (चवि. ८.६०)
आक्षेपांचे निरसन. दोषवचनाचा परिहार करणे.
**–काल**–पु., **पथ्यकालः** ( चसि. १.४ )पथ्याचा काळ.
**–विरुद्ध**–वि., **यथा वराहादिसेवनोत्तरमुष्णसेवनं घृतादिपानोर्ध्वं च शीतसेवनं दोषप्रकोपात्परिहारविरुद्धं भवति ।** ( चसू. २६.९८ )
घेऊ नये ते घेणे, त्यागाच्या विरुद्ध.
जसे डुक्कराचे मांस सेवनानंतर उष्ण सेवन तूप इत्यादी सेवन केल्यानंतर थंड घेणे. दोषप्रकोप होतो म्हणून पथ्याच्या विरुद्ध होय.

**परिहार्य**–वि., **त्याज्यः; सेवनानर्हः परिहरणयोग्यः** ( असंशा. ४. ) त्याज्य. सेवनास अयोग्य.

**परिहृष्टरोमता**–स्त्री., **लक्षण० उद्धर्षितरोमता, उच्छून रोमता** ( ड. सुउ. २४.५ )
रोमांच उभे रहाणे. अंगावर काटा येणे. केस ताठ होणे.

**परीकर्त**–पु., **लक्षण० कृन्तनवत् वेदना** ( अहसू. ४.३ )
कातरल्यासारखी वेदना.

**परीक्षक**–पु., **समीक्ष्य कर्मकर्ता श्रुतबुद्धिस्मृत्यादिगुणैरुपेतः** ( चसू. २८.३६-३७ )
शास्त्र, बुध्दि, स्मृति इत्यादी गुणांनी युक्त असून, नीट पाहून कार्य करणारा.

**परीक्षा**–स्त्री., **लक्षितस्य यथालक्षणमुपपद्यते न वेति प्रमाणैरवधारणम्** ( चवि. ८.१८ ) **वस्तुस्वरूपनिर्णयः** ( चवि. ४.७ )
ठरलेल्या गुणाप्रमाणे गुण आहेत किंवा नाहीत हे सप्रमाण पहाणे. ज्याचे लक्षण केलेले आहे ते त्याला लागू पडते की नाही हे पहाणे. प्रमाण तर्क यांनी वस्तूचे स्वरूप पहाणे.
**आतुरभेषजादीनां लक्षणैः परीक्षणम्** ( चवि. ८.७९ )
रोगी औषधे यांची लक्षणांनी तपासणी करणे.
**परीक्ष्यते व्यवस्थाप्यते वस्तुस्वरूपमनयेति परीक्षा प्रमाणम्** ( चक्र. ) **द्विविधा परीक्षा ज्ञानवतां प्रत्यक्षमनुमानं चेति** ( चवि. ४.७ ) **आप्तोपदेशप्रत्यक्षानुमानयुक्तिभेदेन सा चतुर्विधा** ( चसू. ११.१७ )
ज्याने वस्तूचे स्वरूप परीक्षले जाते ठरविले जाते तेच परीक्षा प्रमाण. ज्ञान्यांनी करावयाची परीक्षा दोन प्रकारची. प्रत्यक्ष व अनुमान. आप्तांचे वचन, प्रत्यक्ष, अनुमान व युक्ति अशी चार प्रकारची.

**परीक्षित**–वि., **यस्य परीक्षा कृता, तत्** ( असंसु. ८.८ )
परीक्षलेले, ज्याची परीक्षा झालेली आहे ते.

**परीक्ष्य**–वि., **परीक्षणीयं परीक्षितुं योग्यम्** ( चइ. १.३-४ )
परीक्षेला योग्य. परीक्षा करण्यासारखे.
**–विषय**–पु., ( परिव० ) **परीक्षितुं योग्या दोषौषधादिभावाः ते एते–दोषौषधदेशकालसात्म्याग्निसत्त्वौकोवयोबलानीति दश परीक्ष्या विषयाः** ( चवि. ३०.३२६; अहसू. १२.६७-६८ )
परीक्षेचे विषय–परीक्षेला योग्य दोष औषध इत्यादि भाव. दोष, औषध, देश, काल, सात्म्य, अग्नि, मन, सवय, वय, व बल हे दहा परीक्षेचे विषय होत.

**पाशुपत**–पु., **वनस्पति० वसुकः** ( रा. १०.३३ रा. परि. ५.३७ ) पांढरी रुई.

**पाषण्ड**–(परिव०) पु., **कापालिकादिः** (चचि. २३.१६०) शंकर इत्यादी.

**पाषाण**–पु., **शिला** ( चचि. २१.१३१; असंसू. ६.४६ ) शिळा, दगड.

**–कदली**–स्त्री., **वनस्पति० काष्ठकदली** ( ध. ४.७८ ) रानकेळ.

**–गर्दभ**–पु., **क्षुद्ररोग० तल्लक्षणम्–कफवाताभ्यां हनुसन्धौ स्थिरोऽल्परुजः शोथो भवति** ( सुनि. १३.१३; असंउ. ३६ )
रोग. लक्षण–कफवात यांनी हनुवटीच्या संधीत स्थिर, थोडी वेदना असलेली सूज येते तो.

**–गैरिक**–न., **खनिज० गैरिकम्** ( ध. ३.१६७; र. ३.४७ ) गेरू, दगड्या गेरू.

**–बहल**–वि., **प्रस्तरबहुलम्** ( र. २.८२ ) पुष्कळ दगड असलेले.

**–भेद**–पु., **वनस्पति० मूत्रविरेचनीयगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१५(३५) **वातकृच्छ्रहरं द्रव्यम्** ( सुउ. ५९.१७ ) **तद्गुणाः– मधुरस्तिक्तः शीतस्त्रिदोषघ्नो शूलहृद्रोगप्लीहरोगगुल्मार्शोबस्तिशुद्धिकरो मूत्रकृच्छ्रमूत्रशर्कराशिश्नशूलतृषादाहमेहाश्मरीविनाशनश्च** ( ध. १.१५७; र. २९.६४; असंसू. १५.३५ )
हिं.—पाखानभेद.
**म.—पाषाणभेद.**
गु.—पाषाणभेद.
बं.—पाथरचूरी.
त.—चेरुपूळैं.
पाषाणभेद–हे द्रव्य मूत्र पुष्कळ व्हावे या गुणांच्या द्रव्याच्या गणांतील आहे. कष्टाने लघ्वी होणे सुधारणाऱ्या गणांतील द्रव्य. **गुण**—गोड, कडु, थंड, त्रिदोषनाशक, शूल, हृद्रोग, प्लीहा, गुल्म, मूळव्याध, कष्टाने लघ्वी होणे, लघ्वीतील रेती, शिश्नातील शूळ नाहीसा करतो; बस्ति शुद्ध करतो; तहान, दाह, प्रमेह, मूतखडानाशक.

**–भेदक**–पु., **वनस्पति० पाषाणभेदः** ( ध. १.१५७) पाषाणभेद.

**–भेदादिघृत**–न., **सिद्धघृत० वाताश्मरीनाशनमिदम्** ( सुचि. ७.५-८ ) पाषाणभेद इत्यादी द्रव्यांनी सिद्ध तूप. वाताचा मूतखडा नाशक.

**–भेदिन्**–पु., **सिद्धयोग० अश्मरीनाशकोऽयम्** ( र. १७.४ ) एक योग. हा मूतखडानाशक.

**पाषाणान्तक**–पु., **वनस्पति० अश्मन्तकः** (रा. ९.२९०) आपटा.

**पिक**–पु., **प्रतुदजातीयपक्षि० कोकिलः** ( रा. परि. २३.६८; पृ. ४२६ ) कोकिळपक्षी, टोचून भक्ष्य खाणारा.

**–बान्धव**–पु., **वनस्पति० आम्रः** ( ध. ५.२ ) आंबा.

**–भक्षा**–स्त्री., **वनस्पति० जम्बूभेदः, भूमिजम्बूः** ( रा. ११.१३४ ) द्र० 'जम्बू' जांभूळ, भुईजांभूळ.

**–राग**–पु., **वनस्पति० आम्रः** ( रा. ११.३ ) आंबा.

**पिकेक्षण**–पु., **वनस्पति० कोकिलाक्षः** (रा. परि. ४.४९) तालीमखाना.

**पिङ्ग**–पु., **मिश्रधातु० पित्तलम्** ( ध. ६.१८ ) पितळ.
न., **वनस्पति० वालकम्** ( ध. १.४७ ) वाळा.
**खनिज० हरितालम्** ( रा. १३.६५९ ) हरताळ.

**( पिङ्गा )**–स्त्री., **वनस्पति० हरिद्रा** ( ध. १.५४ ) हळद.
**वनस्पति० वंशरोचना** ( रा. ६.८६ ) वंशलोचन.
**भैषज्य० गोरोचना** ( ध. ३.२० ) गोरोचन.
**सौम्यलूत० इयमण्डजा** ( असंउ. ४४ ) **तद्दष्टलक्षणानि–दंशोऽग्नि–दग्धाभो भवति। स्फोटो बहुस्रुतिस्तीव्रशोफज्वररुजाहृत्पीडादाहतृड्युक्तश्च भवति** ( असंउ. ४५ )
लूत. एक प्रकारचा किडा आहे. हा चावला म्हणजे भाजल्याप्रमाणे फोड येतात. त्यातून बराच स्राव येतो, सूज येते, ज्वर, दुखावा, हृदयपीडा, दाह, तहान ही लक्षणे उत्पन्न होतात.

**–मूल**–न., **वनस्पति० गर्जरम्** ( रा. ७.९८ ) गाजर.

**–सार**–न., **खनिज० हरितालम्** ( रा. १३.५९ ) हरताळ.

**पिङ्गाक्ष**–वि., **लक्षण० पिङ्गे रक्तवर्णे चक्षुषी यस्य सः** ( असंशा. २.५७ ) पिंगट लाल डोळे असणारा.

**पिङ्गभास**–पु., **सविषकीट० गोघेरकेष्वेकस्तेन दष्टस्य शोफो दाहरुजौ च भवतः** ( सुक. ८.२८ )
विषारी किडा हा चावल्याने सूज दाह, पीडा, उत्पन्न होतात.

**पिङ्गल**–पु., **सर्प० मण्डली** ( सुक. ४; ३४. (२)
सर्प, घोणस.
न., **वनस्पति० गर्जरम्** (ध. ४.६९) गाजर.
**मिश्रधातु० पित्तलम्** ( रा. १३.१७ ) पितळ.

**( पिङ्गला )** –स्त्री., **वनस्पति० हरिद्रा** ( रा. ६.८० )
हळद.
**भैषज्य० गोरोचना** ( ध. ३.२० ) गोरोचन.
**मिश्रधातु० पित्तलम्** ( ध. ६.२० ) पितळ.
**जलूका०, निर्विषाणां जलूकानामन्यतमा, किञ्चिद्रक्ता वृत्तकाया पिङ्गाऽऽशुगा च** ( सुसू. १३.१२ )
**द्र० ' जलौका '**
विषारी नसलेली जळू, किंचित् तांबूस वाटोळी पिंगट व भरभर सरकणारी असते.
**पक्षि०** ( असंशा. १२.९ ) पिंगळा पक्षी.
**कीट० मक्षिकाभेदः द्र० ' मक्षिका '**
( सुक. ८.३५ ) पिंगला माशी.
**–नामक**–न., **निर्यास० तुरुष्कः** ( ध. ३.२३ )
ऊद, धूप.
**–लोह**–न., **मिश्रधातु० पित्तलम्** (रा. १३.१७) पितळ.

**पिचु**–पु., स्त्री., **स्थूलकर्पटिका** ( चक. चचि. १९.४६ )
कापसाचा जाडा बोळा.
**कार्पासस्य वस्त्रम्** (चशा. ८.३२) कापसाचे वस्त्र.
**कार्पासतूला** ( सुचि. १.४० ) कापसाची वात.
**बीजहीनः कार्पासः** ( सुसू. १३.१९ )
सरकी नसलेला कापूस.
**मान० कर्षः** ( चक. १२.९० ) तोळा.
**वनस्पति० कार्पासी** ( रापरि. ४.४५ ) कपाशी.
**फल० वातामादिफलवर्गोक्तः** ( सुसू. ४६.१८७ )
पिलूफळ, बदाम इ० मधुर वर्गातील फळ.
**–मन्द**–पु., **वनस्पति० किराततिक्तः** ( ध. १.३४ )
काडे किराइत.
**निम्बः** ( ध., १.२९; सुचि. २२.५४ )
निम्ब, कडुनिम्ब.
**–मर्द**–पु., **वनस्पति० निम्बः** ( चक. १,२२; सुचि. ९.७ ) **निंब.**
**–वर्ति**–स्त्री., **कार्पासवर्तिः** ( अहसू. २३.३ )
कापसाची वात.

**पिचुक**–पु., **रत्नविशेषः, अयं मणिरुत्तरापथे प्रसिद्धः**
( चचि. २३.२५२ )
पिचुक नांवाचे रत्न. उत्तरप्रदेशांत प्रसिद्ध.
**वनस्पति० करीरफलम्** ( सुचि. ७.१७ ) **पिचुकः करीरः तस्य फलम्** नेपती. नेवतीचे फळ.
**कार्पासफलम्** ( ड. सुचि. ७.१७ ) कापसाचे बोंड,

**( पिचुका )**–स्त्री., **रत्नपुष्पेति काचिदौषधिः**
( इन्दु. असंउ.४२ ) रत्नपुष्पा नावाची औषधि.

**पिच्चट**–न., **खनिज० वङ्गम्** ( ध. ६.१३ ) वंग. कथील.

**पिच्चिट**–पु., **आग्नेयकीट०** ( असंउ. ४३ ) **सविषकीटः, अग्निप्रकृतिकोऽयं पित्तजरोगान् करोति**
( सुक. ८.८–१२ )
पिच्चिट नावाचा विषारी किडा. हा आग्नेय प्रकृतीचा, हा किडा चावला असताना पित्तासंबंधी रोग करतो.

**पिच्चिटक**–पु., **कीट०** ( ड. सुक. ३.५ ) **शकृन्मूत्रविषोऽयम्** ( सुक. ३.५ )
पिच्चिट नावाचा विषारी किडा. याच्या विष्ठा व मूत्रात विष असते.

**पिच्चित**–न., **सद्योव्रणविशेषः पाषाणलगुडादिभिरुत्पन्नः सद्योव्रणस्य प्रकारः** ( सुचि. २.९–१० ) **चिप्पटीभूतम्, चिर्पितम्** ( ड. सुसू. ४५.११२ ) **विदलितम्** (इन्दुः असंउ. ३१ ) **यत् प्रहारेण पीडनेन वा गात्रमस्थियुक्तमसृङ्मज्जप्लुतं पृथुतामापद्यते तत्** ( असंउ. ३१ )
दगड, लाकूड इत्यादींचे आघाताने ठेचले गेल्यामुळे होणारी जखम. माराने चपटे होणे, तुकडे होणे. आघाताने किंवा दबल्यामुळे एकादा अवयव हाडावर मार लागल्याने रक्त, मज्जा यांसह आघातित होऊन पसरट होणे, पिकणे.
**अस्थिकाण्डभङ्गस्य प्रकारः, तल्लक्षणम्–यदस्थि पीडितसदृशं विस्तीर्णतां गतं भवति तत्** ( सुनि. १५.१० ) **द्र० ' भग्न '**
हाडाची नळी मोडण्याचा प्रकार. या प्रकारात हाड दाबले गेल्याने पिचून पसरट होते व बरीच सूज येते.

**पिच्छ**–न., **पक्षः** ( असंचि. ११ ) पंख, सावरीचा डिंक.

**(पिच्छा)**–स्त्री. **वनस्पति० शाल्मली** ( ध. ५.१२६ )
सावरी, शाल्मली.
**शाल्मली-निर्यासः** ( चक. ६.८ ) सावरीचा डिंक.
**शारीर० पिच्छिलभागः** ( चसू. २८.४ )
साबरीच्या सालीतील बुळबुळीत भाग.
**–नलिका**–स्त्री., **मयूरपिच्छजा पिच्छनाडी**
( अहसू. २५.२४ ) **मोराचे** पिसाचा पोकळ दांडा.

**-नाडी**-स्त्री., पिच्छनलिका ( असंसू. ३४.१३ )
बस्ति देण्याच्या भांड्याला जोडलेली नळी.

**पिच्छन**-न., अत्यर्थपीडनम् ( चसू. १८.४ )
अतिशय दाबणे.

**पिच्छलक**-पु., वनस्पति० धन्वनः ( रापरि. ९ २० )
धावडा.

**पिच्छला**-स्त्री., वनस्पति० शूली ( रापरि. ८.६८ )
पाण्याच्या आश्रयाला होणारी जमीनीवर सरपटणारी घोळी सारखी वनस्पती, जी चुरमळही असता बुळबुळीत होते.
अतसी ( रा १६.१८७ ) अळशी.

**पिच्छा**-स्त्री., ( ध. ५.१२६ ) सावरी.

**-बस्ति**-पु., बस्ति० पिच्छिलद्रव्यैः कृत आस्थापनबस्तिः ( सुउ. ४०.१११ ) द्र० ' बस्ति '
बुळबुळीत गुणाच्या औषधिद्रव्यांनी तयार केलेला आस्थापनबस्ति.

**पिच्छिल**-पु., गुण० परिपक्वश्लेष्मातकमांसबब्बूलनिर्यासप्रभृतिस्थितो दृढतरश्लेषणकरो गुणविशेषः वीर्यसंज्ञकोऽयं,अम्बुगुणभूयिष्ठश्चक्षुःस्पर्शाभ्यां ग्राह्यः ( सु.सू. ४१.११ ) विशदविपरीतो द्रव्यस्य लेपने शक्तिः (सु.सू. ४१.४१) दृढतरसंयोगजनको गुणः ( च.शा. ६.१० ) : तस्य कर्माणि-जीवनो बल्यः सन्धानः श्लेष्मलो गुरुः ( सु.सू.४६.५१७ )
पिकलेले भोकर व डिंक यांत असलेला लेप करण्यास उपयोगी अतिशय घट्टपणा प्राप्त करून देणारा चिकट गुण. पिच्छल हा २० गुणांपैकी एक गुण आहे तसेच द्रव्याच्या ठिकाणच्या वीर्यगुणापैकी एक गुण. याची कामे जीवनशक्ति देणे बल देणे, जोडणे कफाचे पोषण करणे गुरुत्व टिकविणे हे आहेत, विशद गुणाच्या विपरीत गुण.
वनस्पति० श्लेष्मातकः (ध. ५. ९४); भोकर.
शाल्मली (ध. ५.१२७) सावरी.

**( पिच्छिला )**-स्त्री., वनस्पति० शाल्मली ( ध. ५.१२७ ) सावरी.
वृश्चिका ( रा.परि. ५.४० ) नखला.
उपोदिका ( रा.परि. ७.७४ ) घोळ, थोर मयाळ.
कोकिलाक्षः ( रा.परि. ४.४९ ) तालीमखाना.

**-च्छदा**-स्त्री., वनस्पति० उपोदिका ( रापरि. ७.७४ )
घोळ, थोर मयाळ.

**-द्रव्य**-( परिव० ) न., विशदविपरीतं द्रव्यम् (सुसू. ३७.११) विशद गुणाच्या विपरीत गुणाचे द्रव्य.

**-बीज**-न., वनस्पति० भव्यम् ( ध. ५.३९ )
कवठ, कपित्थ.

**-सार**-पु., निर्यास० मोचरसः शाल्मली ( रा. ८.२१५ ) मोचरस, सावर.

**पिच्छोत्पत्ति**-स्त्री., पिच्छाया उत्पत्तिः, जलजन्मपूर्वरूपं पिच्छोत्पद्यते ( चक्र. चचि. १३.४८ ) पिच्छासदृशो भागः पिच्छा; अन्ये तु भक्तमण्डसदृशीं पिच्छामाहुः (चक्र. चचि. १३.४९)
उदर रोगात पाणी होण्यापूर्वी पिच्छा उत्पन्न होते. पिच्छा म्हणजे भाताच्या पेजेसारखा बुळबुळीत पातळ पदार्थ.

**पिञ्जर**-न., वनस्पति० नागकेसरम् (रा.६.७४) नागकेशर.
खनिज० हरितालम् ( ध. ७.११९ ) हरताळ.

**( पिञ्जरी )**-स्त्री., खनिज० अग्नौ ध्मातं ततो द्रवे-औषधस्वरसे निर्वापितं च सत् पाण्डुपीतप्रभं जातं लोहान्तरयुतं लोहम् ( र. ८.२२ )
धातूत दुसरा धातु मिसळून अग्नीवर फुंकून औषधाच्या रसात विझवून पांढऱ्या पिवळ्या रंगाचा झालेला धातु.

**-त्व**-न., रक्तवर्णः (चसू. ५.३०) केसाचा पिंगटपणा.

**पिञ्जरक**-न., खनिज० हरितालम् ( ध. ७.११९ )
हरताळ.

**पिञ्जान**-न., खनिज० सुवर्णम् ( रा. १३.२ ) सोने.

**पिटका**-स्त्री., लक्षण० पिडका ( असंनि. १०.३६ )
फोड, फोड्या.

**पिटिका**-स्त्री., लक्षण० पिडका, मधुमेहे उपद्रवस्वरूपा इयम् ( असंउ. २७. )
पुळी, फोड., मधुमेह रोगातील पुळीस्वरूपाऱ्चा एक उपद्रव.
कपालगतरोग० कपाले जाता पिटिका ( असंउ. २७. )
कपाळावर उठलेल्या फोड्या, पुळ्या.
बालरोग० बालानामष्टौ । पिडकाः स्वशरीरदोषात् स्वदोषाच्चोत्पद्यन्ते ( का द्विव्रणीयचि. )
बालरोगात होणाऱ्या आठ प्रकारच्या पिटिका-किंवा फोड्या-पुळ्या.

**पिठर**-पु., पात्र० स्थाली (चसू. १५.७) थाळी, पितळी.

**पिडक**-पु., रोग० पिटिका ( चसू. १७.४ ) फोड.

**( पिडका )**-स्त्री., रोग० पीटिका ( चसू. १६.१३; सुनि. ६.१४) रक्तप्रदोषजरोगेष्वेकः (चसू. २८.११)

बहिर्मार्गजो व्याधिः, ग्रन्थिरूपः शोफः
( चचि. १२.८८ ) तल्लक्षणानि–यस्य त्वचि रक्ते प्रकुपितं पित्तमवतिष्ठते तस्य पिडका सरागं शोथं जनयेत् ( चसू. १८.२४ )
त्वचेचे ठिकाणी रक्त व पित्त दोषांमुळे होणारा एक विकार. बाह्यमार्गावर म्हणजे हातपाय रक्तादिधातूची स्थाने आणि कातडी या ठिकाणावर गाठीसारखी सूज येते, नंतर कातडीवर तांबूस रंगाचे सूज असणारे फोड उत्पन्न होतात.
**गुदरोग० तदवस्था द्विविधाऽभिन्ना भिन्ना च तत्राऽभिन्ना भगन्दरपूर्वरूपा, भिन्ना भगन्दरा** ( सुनि. ४.३ ) द्र० 'भगन्दर'
गुदामध्ये अपानद्वारात दोन प्रकारचे फोड येतात. १ फुटणारा फोड; याचेच रूपांतर पुढे **भगन्दर** रोगात होते. २ न फुटणारा फोड हा त्या भगंदराचे पूर्वरूप आहे.
**नेत्ररोग०** ( सुउ. १.४० ) डोळ्यांचा रोग.

**पिडकिन्**–वि., पिडका व्रणौष्ठेऽणुमांसाङ्कुराः तद्युक्तः ( सुसू. २३.१८ )
व्रणाच्या कडेवर पुळ्यासारखे बारीक मांसांकुर झाले आहेत असा.

**पिडकोलिका**–स्त्री., नेत्रमलः ( चक्र. चनि. २.६ )
नेत्राचा मळ.

**पिण्ड**–पु., वर्तुलाकृतिः ( सुशा. ३.१८ )
वाटोळी आकृति.
**अञ्जन० गुटिकाञ्जनम्** (असंसू. ३२) द्र० 'अञ्जन'
मेणासारखे जाड काजळ. तीन प्रकारचे अंजनात पहिल्या नंबरचे अंजन.
**सारोद्धारः, तात्पर्यम्** ( चवि. ८.१५ )
सारांश, निर्णय,
**पिण्डकरणं मेलनमिति यावत्, जारणाया इदम् अवस्थात्मकं द्वितीयं रूपम्** ( र. ८.७२-७३ )
जारणविधीचे अवस्थात्मक हे दुसरे स्वरूप आहे. यामध्ये पाऱ्याचा गोळा करण्याची शक्ति उत्पन्न होते.
**कवलो ग्रासः** ( ड. सुउ. ६४.८० ) घांस.
**ग्रन्थ्याकारः** ( चक्र. चशा. ४.१० )
ग्रंथीच्या आकाराचा, गाठीसारखा.
**न., भैषज्य० बोलम्** ( ध. ३.६२.अ. ) बोल.
**खनिज० लोहम्** ( ध. ६.२६ ) लोह.

**–कन्द**–पु., वनस्पति० कन्दग्रन्थिः ( रापरि. ७.२४ )
गोल केसाळ अनेक कंदाची गाठाळ व विड्याच्या पानासारख्या पानाची वनस्पती.

**–खर्जूरिका**–स्त्री., वनस्पति०
**तद्गुणाः–मधुरा, शीता, गुरुः, स्निग्धा, पुष्टिदा, संतर्पणी श्रमहारिणी, वीर्यवर्धिनी, हृद्या, पित्त-कफघ्नी, दाहास्रपित्ततृष्णाश्वासनाशिनी**
( रा. ११,६८–७० )
हिं.—खर्जूर.
**म.—शिंदी; खर्जूरी.**
गु.—खजूरी.
बं.—पिण्डखेजूर.
ता —खजुरपुपण्डु.
फा.—तमररुतब.
शिंदी, खजूरी, **गुण**– गोड, थंड, जड, स्निग्ध, पौष्टिक, धातुक्षय भरून काढणारी, श्रमहारक, वीर्यवर्धक, हृदयाला हितकर, पित्तकफनाशक, दाह, रक्तपित्त, तहान, श्वास, नाशक.

**–खर्जूरी**–स्त्री., वनस्पति० **पिण्डखर्जूरिका,** (रा. ११.६८–७०; ध. ५.५५) खजूर. पेंडखजूर.

**–गुडूचिका**–स्त्री., वनस्पति० **गुडूची** ( रा. ३.३ )
गुळवेल.

**–तालक**–न., खनिज० हरितालभेदः द्र० 'हरिताल' ( र. ३.७४ ) हरताळ, पिंडहरताळ.

**–तैल**–न., सिद्धतैल० **मधूच्छिष्टमंजिष्ठा सर्जरससारिवाभिः सिद्धमिदं वातशोणितेऽभ्यङ्गार्थमुपयुज्यते** ( चचि. २९.१२३ ) **अपरिस्रुतं किट्टयुक्तं तैलम्** ( ड. सुचि. ५.१२ )
वातरक्तरोगात अभ्यंगासाठी सांगितलेले मेण, मंजिष्ठ, राळ, अनंतमूळ यांनी सिद्ध केलेले तेल.

**–तैलक**–पु., निर्यास० **तुरुष्कः** ( रा. १२.३७ )
ऊद, धूप.

**–फला**–स्त्री., वनस्पति० **कटुतुम्बी** ( ध. १.१७०; चक्र. ३.३; सुचि. १८.१३ ) कडुभोपळा.

**–मुस्त**–पु., वनस्पति० **मुस्ता** ( ध. १.४१ )
नागरमोथा.

**–मुस्ता**–स्त्री., वनस्पति० **मुस्ता** ( रा. ६.६१ )
नागरमोथा.

**–मूल**–न., वनस्पति० **तद्गुणाः– कटूष्णं गुल्मवातात्रिदोषनुत्** ( रा. ७.५७ )

हिं.—मुला, मूलबीज.
म.—**मुळा.**
गु.—मुरी.
बं.—मुला.
ता.—मूलाङ्गी.
मुळा. गुण—तिखट, उष्ण, गुल्मवात, इत्यादी दोषनाशक.

**–मूलक**–न., **वनस्पति० मूलकभेदः । द्र० ' मूलक '** ( रा. ७.५७ ) मुळ्याचा एक प्रकार.

**–रोहिणक**–पु., **वनस्पति० विकङ्कतः** ( रा. ९.५५ ) मऊफळाचा, गांठील, मऊ कांटे असलेली वनस्पती गोपघोटा., बेहकळ, बेहळी.

**–स्वेद**–पु., **उपक्रम० उष्मस्वेदविशेषः पिण्डरूपः स्वेदः** ( चसू. १४.२५ ) **तत्र कपालपाषाणलोष्टलोहपिण्डानग्निवर्णान्संदंशेन गृहीत्वाऽम्भस्यम्ले वा निमज्जेत् । तैरार्द्राविकवस्त्रेण वेष्टितैः श्लेष्ममेदोभूयिष्ठं सरुजमङ्गं ग्रन्थिमद्वा स्वेदयेत् । पांसुसिकतागवादिपुरीषे धान्यबुसपुलाकपलालैर्वाऽम्लोत्क्वथितैः पूर्ववद्वेष्टितैर्गवादिशकृताऽऽर्द्रेण पिण्डीकृतेनोपनाहद्रव्योत्कारिकाकृशरापायसपिण्डैर्वा वातरोगेष्विति पिण्डस्वेदः** ( असंसू. २६.८ )
पिंडस्वेद. औषधात तांदूळ शिजवून त्याचे गरम गरम गोळे वस्त्रात घेऊन त्याने शेक देणे.
दगडाचे तुकडे, किंवा लोखंडाचे तुकडे तापवून लाल करून चिमट्यात धरून कांजीमध्ये किंवा पाण्यात बुडवावे. मेंढीच्या पातळसर ओल्या चामड्यात किंवा वस्त्रात ते तुकडे गुंडाळून कफमेदोदोषांनी पीडित अंग किंवा गाठाळलेला भाग शेकावा. किंवा गाईचे शेण कांही आंबट घालून गरम करून त्याने शेक करणेसहि पिण्डस्वेद म्हणतात. किंवा निरनिराळ्या तऱ्हेची धान्याची पोटीसे, भाकरी, खिचडी, इत्यादी अन्न पदार्थ आंबट पदार्थांत शिजवून त्याने शेकण्याचे क्रियेस पिण्डस्वेद म्हणतात.

**–हिङ्गु**–न., **वनस्पति० नाडीहिङ्गु** ( ध. २.४० ) हिंगाचा एक प्रकार.

**पिण्डक**–पु., **वनस्पति० कन्दग्रन्थिः** (रा. परि.७.२४) गाठाळ लव असलेल्या अनेक कांद्यांची विड्याच्या पानासारख्या पानांची वनस्पती.
**तुरुष्कः** ( ध. ३.२३ ) ऊद, धूप.
न., **वनस्पति० पिण्डमूलम्** (रा ७.५७; पृ. १४१) मुळ्याचा मोठा कांदा.
**भैषज्य० बोलम्** ( रा. ६.११६ ) बोळ.

**( पिण्डका )**–स्त्री., **अङ्कुराः, प्ररोहा** ( सुशा. ३.१८ ) अंकूर, कोंब.

**पिण्डलिका**–स्त्री., **रोग० नाड्या असम्यक्कल्पनजातरोगाणामेकतमोऽयम् परिमण्डलयुता** ( चशा. ८.४५ ) नाळ चांगली न कापल्याने होणाऱ्या रोगापैकी एक विकार.

**पिण्डाञ्जन**–न., **अञ्जन० बालानां वर्त्मरोगे उपयुक्तम्** ( असंउ. १२ )
पिण्डाञ्जन. काजळ, मुलांच्या पापणीच्या रोगात उपयुक्त.

**पिण्डातक**–पु., **वनस्पति० मदनः** ( ध. १.१६८ ) गेळफळ.

**पिण्डामृता**–स्त्री., **वनस्पति० गुडूची** ( ध. १.४ ) गुळवेल.

**पिण्डायस**–न., **खनिज० तीक्ष्णलोहम्** (रा. १३.३० ) तीक्ष्णलोह.

**पिण्डालु**–पु., **वनस्पति० कन्दशाकम् कन्दग्रन्थिः** (रापरि.७.२४; चचि.१४.९) अळूचा कांदा, भाजी.
**गुडूची,** (रा.३.४) गुळवेल.

**पिण्डालुक**–न., **शाक०** (चसू. २७.१२३) **आलुककन्दः गुरु वातकफकरम्** (सुसू. ४६.३०४) अळूचा कांदा. जड आणि वातकफ करणारा.

**पिण्डासव**–पु., **आसुत० पिप्पलीगुडबिभीतकसाधितोऽयं ग्रहण्यां शस्तः** (चचि. १५.१६०–१६२)
पिंडासव. पिंपळी, गुळ, बेहडा, याचे आसव. ग्रहणीवर प्रशस्त.

**पिण्डाह्वा**–स्त्री., **वनस्पति० नाडीहिङ्गु** ( रा. ६.६४ ) कळकाच्या पानासारखी पाने असलेली हिंगाच्या जातीची वनस्पती.

**पिण्डि**–स्त्री., **वनस्पति० अशोकः** ( चचि. १४.१० ) अशोक.
**तालः** ( चचि., १४.१० ) हरताळ.
**खर्जूरः** ( चचि. १४.१० ) खजूर.
**पिण्डिका**–स्त्री., **वनस्पति० श्वेताम्ली** ( रा. परि. ४.३७ )
एक आंबट गोड पांढरी वनस्पती.
**शारीर० जङ्घापिण्डिका** ( चइ. १०.५ ) पिंडरीचा फुगीर भाग, पोटरी.
**आसनम्** ( चसू. १४.४६ ) बैठक, आसन.

**पिण्डिकोद्वेष्टन**–न., लक्षण० पुरीषनिग्रहजलक्षणभूतं पिण्डिकाया उद्वेष्टनम्, पिण्डिका जङ्घायाः पश्चिमे भागे पिण्डिकाकृतिमांसम्, तस्या उद्वेष्टनम् उद्वेष्टमानायामिव दुःखम् ( अहसू. ४.३. हे. ) अशीतिवातविकारेष्वेकः ( चसू. २०.११ चसू. ७.८ ) पोटऱ्या वळणे, दुखणे, ठणकणे ऐशी वातविकारापैकी एक.
शौचाच्या वेगाच्या अवरोधाने होणारे लक्षण.

**पिण्डित**–वि., कुण्डलीभूतः ( चनि. ३.७ )
गोलाकार होणे.
**घनीभूतम्, संहतम्** ( सुशा. ८.२६ )
घट्ट होणे, घन होणे, एकत्र होणे.
**गोलाकारम्** ( र. २.७१–७३ ) गोलाकार.
पु., **वनस्पति० तुरुष्कः** ( ध. ३.२२ ) धूप, ऊद.

**पिण्डितोष्मन्**–वि., **पिण्डीभूतो नाम एकत्रीभूत ऊष्मा यस्य तत्** ( असंसू. ४.१२ )
ज्याची उष्णता एकत्रित झाली आहे असा.

**पिण्डी**–स्त्री., **यवसक्तुपिष्टमयो गोलाकारः कृतान्नविशेषः** ( सुसू. ४६.४१२ ) सातूचे पीठाचा घट्ट गोळा.
स्त्री., **शारीर० मांसपिण्डी, जङ्घापिण्डिका** ( चचि. १२.९८ ) पिंडरीतील मांसल भाग.
**वनस्पति० मदनः** ( ध. १.१६८ ) गेळफळ.

**पिण्डीत**–पु., **वनस्पति० मदनः** ( चचि. २६.२७२ )
गेळफळ.

**पिण्डीतक**–पु., **वनस्पति० मदनः** ( चक. १.२७ )
**स त्रिविधः, पीत–श्वेत–कृष्णपुष्पवर्णभेदात्** ( सुचि. २५.२८ )
गेळफळ, पिवळ्या, तांबड्या व पांढऱ्या रंगाच्या फुलावरून याचे तीन प्रकार आढळतात.

**पिण्डीतगरक**–न., **वनस्पति० तगरम्** ( रा. १०.१०३ )
तगर.

**पिण्डीपुष्प**–पु., **वनस्पति० अशोकः** ( रा. १०.२७२ )
अशोक.

**पिण्याक**–पु. न., **तिलकल्कः** ( चक. चचि. १४.९ )
–**तिलखलिः** ( चसू. २२.२९ ) **तैलनिष्पीडितानां तिलादीनां पिण्डिः, शुष्कतिलकल्कः** ( चनि. २.४ )
**तद्गुणाः—लेखनो रूक्षो विष्टम्भी, दृष्टिदूषणश्च** ( सुसू. ४६.३८१ ) **सर्वदोषप्रकोपकः** ( सुसू. ४६.२९४ ) **संयोगतः पयसा सह विषतुल्यं भवति** ( सुसू. २०.८ )
तिळाचा कल्क. तिळाची पेंड, तिळाच्या पेंडीचे गुण–दोषांना खरडून काढणे, रूक्ष, मलावष्टंभ करणारी व डोळे बिघडवणारी आहे. दुधाबरोबर एकत्र करून घेतली तर संयोगाने विषाप्रमाणे दुष्परिणाम करणारी आहे.
**निर्यास० तुरुष्कः** ( ध. ३.२२ ) ऊद, धूप.
–**विकृति**–स्त्री., **पिण्याकस्य विकृतिः, पिण्डवटकादिदेशीया** ( हे. अहसू. ६.३४ )
पेंडीचा प्रकार. जसे ढेपाची पेंड. चुन्याची पेंड. इत्यादी. पेंडीचा केलेला पदार्थ.

**पितामह**–पु., **देवता० ब्रह्मा** ( चसू. १.२४ ) ब्रह्मदेव.

**पितृ**–पु., **अर्यमादिः, परलोकं गतः पूर्वजः** (चनि. ७.१०)
**अग्निष्वात्तादयः** ( सुसू. ५.२८ )
पूर्वज. अर्यमा इत्यादी. परलोकात गेलेले पूर्वज. अग्निष्वात्त इत्यादी.
**भूताधिपति०** ( असंउ. ७ )
अठरा प्रकारच्या भूताधिपतीपैकी एक.
–**ग्रह**–पु., **पुरुषविग्रहग्रह०** ( का. बालग्रहचि. )
**नैगमेषो बालस्यान्यग्रहेभ्यो रक्षकत्वात् पितृग्रहसंज्ञामलभत** ( सुउ. २७.५ ) **पितृग्रहाविष्टस्य लक्षणानि–रोमहर्षो मुहुस्त्रासः सहसा रोदनम् ज्वरः, कासोऽतिसारो वमथुर्जृम्भा, तृट्, शवगन्धिताऽङ्गेष्वाक्षेपविक्षेपौ शोफः, स्तम्भो विवर्णता, मुष्टिबन्धोऽक्ष्णोः स्रुतिः** ( असंउ. ३ )
पितृग्रह जे बारा बालग्रह आहेत. त्यामध्ये पुरुषदेहधारी ग्रह पाच आहेत त्या पुरुषदेहधारी ग्रहापैकी एक.
या पितृग्रहामुळे बालकाच्या अंगावर रोमांच येतात, ते चिडते व एकाएकी रडते, ताप, खोकला अतिसार, ओकारी, जांभई, तहान, प्रेतासारखा दुर्गंध अंगाला येतो, झटके येतात, हात पाय आपटते, सूज, शरीर ताठते, वर्ण बदलतो, हाताच्या मुठी घट्ट करते, डोळ्यातून स्राव होतो.
–**ज**–वि., **पितुर्जायते जातो वा इति** ( चशा. ३.७; असंशा. ५ ) वडिलांकडून झालेला.
–**जभाव**–पु., **पितुः शरीरादागतो भावः गर्भस्य केशश्मश्रुलोमास्थिनखदन्तसिरास्नायुधमनीरेतः–प्रभृतीनि स्थिराणि** ( सुशा. ३.३३ )
गर्भाच्या ठिकाणी पित्याच्या शरीरगुणामुळे निर्माण होणारे नख, दाढी, मिशा, शरीरावरील केस, हाडे, दांत, सिरा, स्नायु, धमनी, आणि शुक्र इत्यादी.

**-जोत्तम**-पु., धान्य० माशः ( ध. ६.९९ ) उडीद.

**-तर्पणपवित्र**-पु., धान्य० तिलः ( ध. ६.१२२ ) तीळ.

**-प्रिय**-पु., वनस्पति० भृङ्गराजः ( रा. ४.२० ) माका.

**पित्त**-न., शारीरदोष० 'तप्' संतापे तेन सञ्जापहे-तुर्पित्तमिति (सुसू. २१.५) धारणाध्दातवः इत्यनेन पित्तं धातुः तस्योत्पत्तिः-आग्नेयं पित्तम् रक्तस्य मलः; ( चचि. १५.१८ ) तस्य स्वरूपम्-अग्निरेव शरीरे पित्तान्तर्गतः कुपिताकुपितः शुभाशुभानि करोति ( चसू. १२.११ ) तद्गुणाः- सस्नेहमुष्णं तीक्ष्णं द्रवं, सरं, लध्वम्लं, कटु, विस्रं, नीलम् ( सुसू. २१.११; अहसू. १.११) तस्य स्थानानि-नाभिरामाशयः स्वेदो लसीका रक्तं रसो दृष्टिः स्पर्शनं-त्वग् ( अहसू. १२.२ ) तद्वृद्धिकालाः-यौवने दिवसस्य निशायाश्च मध्यकाले, भुक्तस्य मध्यकाले (अहसू. १.८) तथा शरदि च, पित्तवृद्धि-र्भवति (अहसू. १२.२४.२५) तत्कर्माणि-साधारणं कर्माऽऽदानम् ( सुसू. २१.८ ) पक्त्यूष्मा, दर्शनं, क्षुधा, तृषा, रुचिः,प्रभा, मेधा,प्रज्ञा, शौर्यं, तनुमार्दवं च; ( अहसू. ११.२-३ ) तद्भेदा :- पाचकं रञ्जकं भ्राजकं साधकम् आलोचकमिति पञ्चविधं पित्तम् ( अहसू. १२।१०-१४ ) शरीरे पित्तप्रमाणं पञ्च अञ्जलयः ( चशा. ७. १५ ) पित्तदुष्टेर्लक्षणानि दोषप्रकरणात् ज्ञेयानि। द्र० 'दोष'

पित्त-शरीरांतील त्रिदोषांपैकी एक दोष, शरीर धारण करते म्हणून यालाच धातु असे म्हटले आहे. रक्तापासून निर्माण होणारे मलस्वरूपीही पित्त आहे. पित्ताचे स्वरूप-शरीरातील अग्नीचे संपूर्ण काम पित्ताच्या आश्रयानेच अग्नि करतो.

**पित्ताचे गुण**—पित्त हे स्निग्ध, उष्ण, तीक्ष्ण, द्रव म्हणजे पातळ, दुसऱ्या पदार्थात मिसळून त्याला पातळ ठेवणारे, हलके, आंबट, तिखट, आमगंध-युक्त, निळसर झांक असलेले आहे. पित्ताची स्थाने-नाभि, आमाशय, घाम, लसीका, रक्त, रस, नेत्र आणि स्पर्शनेंद्रिय त्वचा. पित्त वाढण्याचा काल-तारुण्य, दिवसाचा व रात्रीचा मध्य काल, भोजनाचे मध्ये, शरद्ऋतूमध्ये. पित्ताची कामे ( कर्म ) शरीरपोषणासाठी बाहेरचे पदार्थ घेणे पचविणे, शरीराची उष्णता कायम राखणे, दृष्टी नीट ठेवणे, भूक उत्पन्न करणे, तहान उत्पन्न करणे. तसेच चव, तेज, बुद्धि, ज्ञान, शौर्य, शरीराचे मृदुत्व इत्यादी.

**पित्ताचे भेद**--( १ ) पाचक ( २ ) रंजक ( ३ ) भ्राजक ( ४ ) साधक ( ५ ) आलोचक असे पाच प्रकारचे पित्त आहे. **पित्ताचे प्रमाण**—शरीरात पित्ताचे प्रमाण पाच ओंजळी आहे.

**पित्तदुष्टीची लक्षणे**—दोष-प्रकरणात सविस्तर सांगितली आहेत ती पहावी.

**प्राणिजपित्त० गोपित्तं गोरोचनेति प्रसिद्धम्,** ( असंउ. ४० ) **श्वपित्तमपस्मारेऽञ्जनार्थं प्रयुक्तम्** ( चचि. १०.५० ) **सिंहव्याघ्रवृकतरक्ष्वृक्षद्वीपिमार्जारशृगालमृगगोधानां पित्तं त्रिफलादिद्रव्यैः सह जीवनेऽगदे उपयुज्यते।** ( असंसू. ८.२९ )

गोरोचन, गायीचे पित्त कुत्र्याचे पित्त अपस्मार विकारामध्ये अंजनाकरिता वापरतात. सिंह, वाघ, लांडगा, तरस, अस्वल, हत्ती, रानमांजर, कोल्हा, हरीण, घोरपड यांचे पित्त त्रिफळा इ० बरोबर **जीवन** नावाच्या अगद औषधात वापरले आहे.

**-कर्मन्**-न., **पित्तस्य कर्माणि** ( अहसू. ११.२-३ ) पित्ताची कामे.

**-तेजस्**-न., **पित्तगत ऊष्मा, पित्तरूपोऽग्निर्वा** ( चचि. ३०.२२१-२३ ) पित्तांतील उष्णता, पित्तरूप अग्नि.

**-द्राविन्**-पु., वनस्पति० **मधुजम्बीरः** ( ध. ५.१८ ) गोड निंबु.

**-द्रुम**-पु., वनस्पति० सरलः ( ध. ३,७८ ) सरळ देवदार.

**-धरा**-स्त्री., शारीर० कलाभेदः, **षष्ठी पित्तधरा नाम, पक्वाऽऽमाशयमध्यस्था इयं ह्यन्तरग्न्यधिष्ठानतयाऽऽमाशयात् पक्वाशयोन्मुखमन्नं बलेन विधार्य पित्ततेजसा शोषयन्ती पचति पक्वं च विमुञ्चति** ( असंशा. ५.४० ) **किंच या चतुर्विधमन्नपानमुपभुक्तमामाशयात् प्रच्युतं पक्वाशयोपस्थितं धारयति** ( सुशा. ४.१८ )

शरीरांतील सात कलांपैकी एक, पित्तधरा कला नावाची सहावी कला. पित्तधरा कला पक्वाशय आणि आमाशय यांचे मध्ये आहे. हेच अंतराग्नि किंवा जाठराग्नीचे स्थान असल्यामुळे आमाशयातून पक्वाशयाकडे जाणारे अन्न ही कला आपले शक्तीने तेथे थांबवून पित्ताचे तेजाने शोषून अन्नाचे पचन करते. परिपक्व अवस्थेत पक्वाशयाकडे अन्नाला सोडते. खाद्य, पेय, लेह्य, चोष्य असे खाल्लेले चतुर्विध अन्न

आमाशयाकडून सुटून पक्वाशयाकडे जाण्यासाठी आलेले अन्न धारण करते.

**–प्रकृति**–वि., दोषप्रकृतिविशेषविशिष्टः उष्णगौरगात्रस्ताम्रनखनेत्रजिह्वौष्ठपाणिपादतलः, शिथिलसन्धिबन्धमांसउष्णसमकपिलविरलमृदुकेशरोमा मध्यबलायुरल्पशुक्रव्यवायापत्यः, शूरोऽभिमानी शीघ्रवलीखलतिपलितपिप्लुव्यङ्गतीक्ष्णक्षुत्पिपासो मेधावी दुर्भगः, स्वादुतिक्तकषायशीताऽभिलाषोपशयश्च भवति ( असंशा. ८.१२ ) दयितमाल्यविलेपनमण्डनः, सुचरितः, शुचिराश्रितवत्सलो विभवसाहसबुद्धिबलान्वितो नारीणामनभिमतो धर्मद्वेषी, स्वेदनः, पूतिगन्धिर्भूर्युच्चारक्रोधपानाशनेर्ष्यः, यस्य च तनूनि, पिङ्गानि, चलानि, तन्वल्पपक्ष्माणि, हिमप्रियाणि लोचनानि, क्रोधेन मद्येन सूर्यातपेनाशु रागं व्रजन्ति । सुप्तः कर्णिकारान् पलाशान् दिग्दाहोल्काविद्युदर्कानलांश्च पश्येत । मध्यायुर्मध्यबलः पण्डितः क्लेशभीरुर्व्याघ्रर्क्षकपिमार्जारयक्षसत्त्ववृत्तिः ( अहशा. ३.९०-९५ ) क्षिप्रकोपप्रसादो विगृह्य वक्ता तेजस्वी समितिषु दुर्निवारवीर्यो भयजनितनम्रतारहितः, अनतेषु कठोरवृत्तिः प्रणतेष्वपि सान्त्वनदानरुचिः ( सुशा. ४.६८-७१ )

पित्तप्रकृति. सात प्रकृतींपैकी एक, शुक्र व आर्तव यांच्या संयोगात व आईच्या गर्भपोषणकालाच्या आहारविहारात जो दोष प्रामुख्याने असेल त्या दोष–प्राधान्याची प्रकृती बनते.

पित्तप्रकृतीच्या माणसाचे शरीर उष्ण आणि गोरे असते. नखे, डोळे, जीभ, ओठ, तळहात व तळपाय लाल असतात. सांध्याची बंधने व मांसल भाग ढिले असतात. उंटाप्रमाणे पिंगट भुरकट, विरल, कोमल, आणि मऊ असे केस आणि शरीरावरील बारीक बारीक लव (लोम ) असते. आयुष्य आणि बल मध्यम असते. शुक्र, कामेच्छा, आणि मुले थोडी ( अल्प ) असतात. पित्तप्रकृती माणसे शूर आणि अभिमानी असतात. अंगावर सुरकुत्या, लवकर पडतात, तसेच टक्कल पडणे, केस पिकणे, अंगावर घामाचे दवबिंदु, व वाङ्ग लवकर उत्पन्न होतात. भूक व तहान तीव्र असते. बुद्धिमान असतात. दुर्दैवी असतात, गोड, कडू, आणि तुरट रसांचे पदार्थ आवडतात, तसेच थंड पदार्थही त्यांना आवडतात आणि प्रकृतीला मानवतात.

शरीराला सुगंधी फुले माळा, सुगंधी लेप उट्या यांनी सुशोभित करणे आवडणारी, उत्तम आचरण असणारी राहाणी स्वच्छ असणारी आश्रितलोकांबद्दल प्रेम-आदर असणारी ऐश्वर्य, बल, साहस, आणि बुद्धि असणारी, शरण आलेल्यांना संरक्षण देणारी, उन्हाचा द्वेष करणारी, कुचकट घाणयुक्त घाम असणारी, बरेच वेळा शौचाला होणारी, संताप, खाणे, पिणे, आणि ईर्षा आधिक्याने उत्पन्न होणारी, झोपेत स्वप्नात पिवळ्या फुलांचा अमलतासवृक्ष, लालफुलांचा पळस, किंवा निरनिराळे दिशांना आगी लागल्या आहेत असे दृश्य, उल्कापात देदीप्यमान सूर्य किंवा अग्नि दिसणारी अशा प्रकारची माणसे पित्तप्रकृतीची समजावीत.

**–प्रसेक**–पु., धान्य० मुद्गः ( ध. ६.८१ ) मूग.

**–भेषज**–न., वनस्पति० मसूरिका (ध. ६.९५) मसूर.

**–रक्त**–न., रोग० रक्तपित्तम् ( असंशा. ६.२४ ) रक्तपित्त.

**–वर्ण**–पु., लक्षण० पीतनीलादयः, ( सुशा. २.४ ) पिवळे, निळसर इत्यादी.

**–वल्लभा**–स्त्री., वनस्पति० अतिविषा ( ध. १.११ ) अतिविष.

**–वाहिनी**–स्त्री.,शारीर० बाहुल्येन पित्तं वहन्ती ( सिरा ) ( सुशा. ७.६ )

पित्तवाहिनी; जी बहुधा पित्ताचे वहन करते ती.

**–विकार**–पु., पित्तदोषजन्या रोगाः, ते चत्वारिंशत्–प्लोषो दवो दवथुर्विदाहः, असंदाहस्त्वग्दाहोऽन्तर्दाहो धूमकोऽम्लक ऊष्माधिक्यमतिस्वेदोऽङ्गगन्धोऽङ्गावयवसदनम्, शोणितक्लेदो मांसक्लेदस्त्वङ्मांसदरणम्, चर्मदरणम्, रक्तकोठो रक्तविस्फोटो रक्तमण्डलानि, रक्तपित्तम्, हरितत्वम्, हारिद्रत्वम्, नीलिका, कक्ष्या, कामला, तिक्तास्यता, लोहितगन्धास्यता, पूतिमुखत्वम्, तृषाधिक्यमतृप्तिरास्यपाको मेढ्रपाको जीवादानम्, तमःप्रवेशो हरितहारिद्रनेत्रमूत्रशकृत्त्वं च ( हे. अहसू. १२.५३ )

पित्तरोग–ते चाळीस आहेत. घामरहित दाह. घामयुक्त दाह. डोळे इ० इन्द्रिये हातपाय इ० अवयव यांवरील दाह, खांद्याची आग, त्वचेचा दाह, पोटात आग, घशातून धूर आल्यासारखे वाटणे, घशात जळजळ व आंबट येणे, उकडणे घाम अधिक येणे, अंगाला घाण येणे, अंग गळून जाणे, रक्ताला दुर्गंधि, पातळपणा येणे, मांस काळे व दुर्गंधि

होणे, त्वचा आणि मांस यांस भेगा पडणे त्वचा फाटणे, चकंद्रळे येणे, जळाल्यासारखे फोड येणे, रक्ताच्या गाठी होणे, रक्तस्राव होणे, त्वचा पिवळी व हिरवी होणे, अंगावर तीळ उठणे, काखमांजरी होणे, कावीळ व तोंड कडू होणे; तोंडाला लोखंडासारखी किंवा रक्तासारखी घाण येणे, तोंडाला दुसरी घाण येणे, तहान अधिक वाटणे. तोंड येणे, तृप्ति न होणे, लिंग पिकणे, जीव घुसमटणे, डोळ्यापुढे अंधेरी येणे, डोळे, मूत्र आणि मळ पिवळे हिरवे होणे.

**–विरुद्ध**–वि., **यत् पित्तकारि तत्** ( **इन्दु.** ) (असंचि. १.१७–१८) पित्ताला वाढविणारे पित्तकर.

**–विष**–वि., **यस्य पित्तं विषमयं, तत् कीटादि–यथा शकुलीमत्स्यरक्तराजि वरकी ( वरटी ) मत्स्याश्च पित्तविषाः** ( सुक. ३.५ )
ज्यांचे पित्त विषमय आहेत ते किडे वगैरे. त्या प्राण्यांची नावे वर आहेत.

**–वेदना**–स्त्री.,**ऊषचोषादिका** ( ड. सुक. ४.३७ )
पित्तवेदना. चुणचुणणे, आग होणे.

**–संशमनवर्ग**–पु., **पित्तदोषशमनद्रव्यसंग्रहश्चन्दनोशीरमंजिष्ठापयस्याविदारीशतावरीहीबेरगुंद्राशैवलकल्हारकुमुदोत्पलकंदकदलीदूर्वामूर्वाप्रभृतीनि काकोल्यादिः सारिवादिरंजनादिरुत्पलादिर्न्यग्रोधादिस्तृणपंचमूलमिति** ( सुसू. ३९.८ )
पित्तदोषशमनद्रव्यसंग्रह–चंदन, वाळा, मंजिष्ठ, पयस्या, भुईकोहळा, शतावरी. काळावाळा, गुंद्रा, शेवाळ, कल्हार, कमळ, निळे कमळ यांचे कंद, केळ, दूर्वा, मूर्वा तसेच काकोल्यादिवर्ग, रंजनादिवर्ग, उत्पलादिवर्ग, न्यग्रोधादिवर्ग, आणि तृणपंचमुळे.

**पित्तल**–वि., **पित्तप्रकृतिपुरुषः** ( चसू. ७.३९ )
पित्तप्रकृति पुरुष.
न., **खनिजद्रव्य० रीतिः पित्तलं वा । तद्गुणाः**—**तिक्तम्, लवणम्, रूक्षम्, शोधनम्, सरम्, वृष्यम्, रसायनम्, वातपित्तघ्नम्, पाण्डुविषकृमिप्लीहावृद्धिवलीपलितनाशनम्** ( ध. ६.१८ )
हिं.—पीत्तल.
**म.—पितळ, सोनपितळ.**
गु.—पीतल.
बं.—पितल.
फा.—**विरञ्ज.**
**पितळेचे गुण**— कडू, लवण, रूक्ष दोषशोधन, सारक, वृष्य, रसायन, वातपित्त नाशक; पांडु, विष, कृमि, प्लीहा, वृद्धि, अंगावर निर्माण होणाऱ्या सुरकुत्या घालविणारी आहे.

( **पित्तला** )–स्त्री., **वनस्पति० शालिपर्णी** ( रा. ४.११४ )
सालवण.

**पित्तलक**–न., **मिश्रधातु० पित्तलम्** (रा.१३.१७) पितळ.

**पित्तान्तक**–पु., **पारदयोग० पारदाभ्रकमुण्डलोहतीक्ष्णलोहमाक्षिकादिसाधितोऽयं पित्तज्वरक्षयदाहतृष्णाभ्रमशोषनाशकः** ( र. १८.२३६–३८ )
पित्तान्तक नांवाचे पित्तप्रधान व्याधीवरील औषध. हे औषध पारा, अभ्रक, मुंडलोह, तीक्ष्णलोह, व माक्षिक यांचे होते.

**पित्तारि**–पु., **वनस्पति० पर्पटः,** ( रा. ५.६६ )
पित्तपापडा.
**बर्बरः,** ( रा. १२.१७ ) बोर.
**लाक्षा,** ( रा. ६.१४२ ) लाख.

**पित्ताशय**–पु., **पित्तस्थानम्, पित्ताशय आमाशयस्य अधस्तनोऽवयवविशेषः ' पक्वामाशयमध्यं पित्तस्य ( स्थानम् )** ( सुसू. २१.६ ) **तत्र आमाशयः पित्ताशयस्योपरिष्टात्** ( सुसू. २१.१२ ) ( चक्र. चचि. ३.१७१-७२ ) **अग्निस्थानम्** ( सुशा. ५.८ )
पित्ताशय, पित्ताचे स्थान. आमाशयाच्या खालचा पक्वाशयाच्या वरचा–दोहोंच्या मधला अवयव.

**पित्तोष्मन्**–पु., **पित्तस्थ ऊष्मा, पित्तजनक ऊष्मा वा** ( चचि. १५.२८ ) पित्ताचा उष्मा.

**पित्र्य**–वि., **मातापितृतः अपत्यम् आगतः पैतृकः** ( चसू. २५.१७ )
आईबापाकडून संततीकडे आलेला ( मेहादिविकार ).
पु., **धान्य० माषः** ( ध. ६.९९ ) उडीद.
न., **पितृहितं कर्म श्राद्धदानादि** ( सुशा. १०.५२ )
पितरांना संतुष्ट करणारे कर्म, श्राद्ध, दान वगैरे.
**मघा नाम नक्षत्रम्** ( ड. सुक. ३.३८ )
मघा नावाचे नक्षत्र.
**भैषज्य० मधु** ( रा. १४.२७० ) मध.

**पिधान**–( परिव० ) न., **आच्छादनम्** ( सुचि. ६.४ )
आवरण.

( **पिधानी** )–स्त्री., **आच्छादनम्** ( र., २०.८६-८७ )
आवरण.
**–पात्र**–न., **आच्छादनपात्रम्** ( र. १८.१५४-५५ )
आवरणासाठी उपयोगाला आणलेले भाण्डे, झाकण.

**पिनद्ध**–वि., पिहितम् ( असंशा. ५.९३ )
बांधलेले, झाकलेले.

**पिनाक**–न., नागमण्डूकादिषु चतुर्विधेष्वभ्रकेष्वेको भेदः द्र० 'अभ्रक' ( र. २.५ )
पिनाक नावाचा अभ्रक, चार प्रकारच्या अभ्रकांपैकी एक.

**पिपासा**–स्त्री., लक्षण० तृष्णा ( चनि. १.२१ ) पातुमिच्छा ( सुसू. १.२५ ) तहान, पिण्याची इच्छा.
रोग० तृष्णा ( चसू. २.२४ ) तहान.

**–निग्रहज**–(परिव.) वि., पिपासाया निग्रहाज्जातः ( चसू. ७.२१ )
तहान अडविल्यामुळे झालेला.

**पिपासालु**–वि., पिपासातिशयवान् ( चशा. ८.२१ )
अतिशय तान्हेला. अति तहान लागलेला.

**पिपासित**–वि., तृषितः ( काक. भोजनकल्प. ११.१२ )
तहानलेला.

**पिपीलिक**–पु., कीट० पिपीलिका (अहसू. २.२३) मुंगी.

**(पिपीलिका)**–स्त्री.,क्रमि०बहिर्मलजोऽयं (चसू.१९.४(९) कफजक्रिमिः दर्भपुष्पमहागुदादिषु षट्प्रकारेष्वेकः ( सुउ. ५४.१२; सुचि. २७.८ )
बाहेरच्या मळातील किडा. कफज क्रमि दर्भपुष्प महागुद इ० सहा प्रकारांपैकी एक.
बहुपादा,कृष्णशुक्लवर्णाऽणुस्तिलाकृतिः(चवि.७.१०) ताः षड्विधाः– थूलशीर्षा, संवाहिका ब्राह्मणिका, कपिलिकाऽङ्गुलिका, चित्रवर्णा च; तस्या दष्टलक्षणानि – श्वयथुरग्निस्पर्शवद्दाहशोफौ भवतः ( सुक.८.३४ ) दष्टचिकित्सा–भृङ्गराजस्वरस–पिष्टकृष्णवल्मीकमृत्तिकालेपनम् (सुक. ८.५४-५५)
बरेच पाय असलेल्या लाल, पांढऱ्या, इत्यादी रंगाच्या अतिशय बारीक असलेल्या, तिळाप्रमाणे असणाऱ्या. त्या सहा प्रकारच्या आहेत. त्या चावल्या असताना–सूज, अग्नीला स्पर्श झाल्याप्रमाणे दाह होतो, सूज येते.
त्यावरील उपाय काळ्या वारुळाची–माती, माक्याचे रसात घोटून एकजीव करून त्या जागेवर लेप द्यावा.

**पिपीलिका**–स्त्री., ( चसू. १९.४.९ अहसू. १०.३ )
मुंगी.

**–भारहरण**–न., स्वल्पायाः पिपीलिकायाः सारशरीरत्वेन महतो भारस्यापि नयनम् ( चक्र. चवि. ८.११५ )
छोटीशी मुंगी बलवान् शरीराने मोठे ओझे वाहू शकते.

**–संचार**–पु., लक्षण० पिपीलिका शरीरे संचरन्तीव वेदना ( असंसू. २७.३७ )
मुंगी शरीरावर मुळमुळते आहे असे सारखे वाटत असणे.

**–संप्रचार**–पु., लक्षण० पिपीलिकासंचारः (चनि.३.७)
मुंगी मुळमुळते आहे असे वाटणे.

**–सृप्ति**–स्त्री., लक्षण० पिपीलिकाभिः सर्पणेनेव क्रियमाणा वेदना ( चचि. ३०.१० )
मुंग्या अंगावरून चालत आहेत अशा वेदना.

**पिप्पल**–पु., वनस्पति० क्षीरिवृक्षः मूत्रसंग्रहणीयगणे धूमपानप्रयोगे चैकं द्रव्यम् ( चसू. ४.१५,५-२२ )
**तद्गुणाः**–स्वादुः, कषायः, शीतः, कफघ्नो रक्तदोषदाहयोनिदोषरक्तपित्तघ्नः ( ध. ५.७८ ) तस्य काष्ठं दन्तधावने निषिद्धम् ( असंसू. ३.२१ ) तत्पत्रम्–सूप्यशाकम् ( चसू. २७.१०५ ) **तद्गुणाः**– मेधायुर्बलजननम् ( असंउ. १ ) तत्फलगुणाः– कषायमधुराम्लानिल वातलानि गुरूणि ( चसू. २७. १६४ )
हिं.—पीपलवृक्ष.
**म.—पिंपळ.**
गु.—पीपळो.
बं.—अश्वत्थ.
फा.—दरखतलरजा.
पिंपळ. पिंपळाची काडी दंतधावनासाठी घेऊ नये. पिंपळाची पाने भाजीसाठी उपयोगी आहेत. त्याचे **गुण**—बुध्दि, आयुष्य आणि बल उत्पन्न करणारे. पिंपळाची फळे–तुरट, गोड, आंबट, वातूळ आणि जड. **पिंपळाचे गुण**—मधुर, कषाय, शीतवीर्य, कफनाशक, रक्तदोष, दाह, योनिदोष, रक्तपित्त नाशक.
हा एक दुधाळ वृक्ष आहे. मूत्रसंग्रहणीय व धूमपान प्रयोगात वापरावयाच्या द्रव्यगणात याचाही अंतर्भाव होतो.

**( पिप्पली )**–स्त्री., वनस्पति० महाकषायवर्गे, दीपनीयगणे, शीतप्रशमनगणे, आस्थापनोपगगणे चैकं द्रव्यम्, (चसू. ४.१७; चसू. ४.९; चवि. १.११६)
**तद्गुणाः**– कटुर्मधुरा, तिक्ता, शीता, स्निग्धा, रसायनी, वृष्या, दीपनी, त्रिदोषघ्नी, तृड्ज्वरोदर-

जन्तुश्वासकासक्षयामनाशिनी ( ध. २.७३ ) साऽऽर्द्रा श्लेष्मशूलप्रशमनी ( सुउ. ४२.११० ) साऽऽर्द्रा शुष्का भेदेन द्विधा-आर्द्रा पिप्पली मधुरा गुर्वी स्निग्धा श्लेष्मला; शुष्का पिप्पली कटूष्णा कफवातघ्नी वृष्या च ( चसू. २७.२९७; सुसू. ४६.२२३ ) अस्याः फलं शिरोविरेचनार्थं वमनार्थं चोपयुज्यते ( सुसू. ३९.६ ) कण्ठ्या हिक्काघ्नी ( चसू. ४.१०-१४ )

हिं.—पीपल.
म.—पिंपळी, लेंडी पिंपळी.
गु.—लिंडी पिपर.
बं.—पिपुल.
ता.—पिंपिलि.
फा.—पिलपिल दराज.

**पिंपळीचे गुण**— तिखट, मधुर, कडू, शीत, स्निग्ध, रसायनयोग्य, शुक्रवर्धक, अग्निदीपक, त्रिदोषनाशक, तहान, ज्वर, उदर, कृमि, श्वास, कास, क्षय व आम नाशक.

**पिंपळीचे प्रकार**— ( १ ) ओली ( २ ) वाळलेली. दीपनगण थंडी कमी करणाऱ्या व शोधन करणाऱ्या बस्तीच्या औषधात आहे.

कर्णरोग० तल्लक्षणम्, कर्णाभ्यन्तरे एकोऽनेको वा नीरुक् स्थिरो मांसांकुरः पिप्पलीप्रमाणः ( असंउ. २१; अहउ. १७.१६ )
कानांतील वाढणाऱ्या पिंपळ्या. एक रोग. पिंपळी एवढ्या आकाराचा वेदना नसणारा मांसाचा अंकूर. हे एक किंवा अनेक होतात.

**पिप्पलक**–न., शारीर० चूचुकम्, स्तनाग्रम् ( चशा. ८.५३ ) स्तनाचे टोक. स्तनाचे बोंड.

**( पिप्पलिका )**–स्त्री., वनस्पति० अश्वत्थी, पिप्पलः ( रा. ११.१२२ ) पिंपळ.

**पिप्पली**–स्त्री., ( चसू. ४.१७ ) पिंपळी.

**–द्वय**–न., पिप्पली गजपिप्पली च ( र. २९.६५-६६ ) पिंपळी–लेंडी पिंपळी मोठी पिंपळी–गजपिंपळी.

**–मूल**–न., वनस्पति० महाकषायवर्गे दीपनीयगणे, शूलप्रशमनगणे चैकं द्रव्यम् ( चसू. ४.९; चसू. ४.१७ ) दीपनीयपाचनीयाऽऽनाहप्रशमनानां श्रेष्ठम् ( चसू. २५.४० ) तद्गुणाः– कटूष्णं दीपनं रोचनं पित्तकरं वातकफघ्नं कृमिघ्नम् ( ध. २.७५ )

हिं.—पीपरामूल.
म.—पिंपळमूळ.
गु.—पीपरीमूलना गंठोडा.
बं.—पिपुलमूल.
ता.—पिप्पली, वेरपिप्पलीदुम्य.
फा.—फल्फिल्, मोया.

**पिंपळमूळाचे गुण**—तिखट, उष्ण, दीपन, चव उत्पन्न करणारे, पित्तकारक, वातकफनाशक, कृमिनाशक दीपकगण व शूलनाशकद्रव्यगणात आहे. दीपक पाचक पोटफुगी नाहीशी करणाऱ्या औषधात श्रेष्ठ.

**–रसायन**–न., रसायनार्थं पिप्पल्युपयुज्यते, द्र० 'रसायन' ( चचि. १(३).३२-३५ )
पिंपळीरसायन रसायन. विधीने पिंपळीचा केलेला उपयोग.

**–वर्धमान**–न., रसायनयोग० योगोऽयं वातव्याध्यादिनाशनो बलकरश्च ( सुउ. ३९.२१६ ) पिपल्यः क्रमशोऽस्मिन्रसायनयोगे वर्धिता भवन्ति, तत् पिप्पलीवर्धमानम् ( चचि. १.( ३ ) ३६–४०; सुचि. ५.१२ )

**–वर्धमानक**–न., रसायनयोग० पिप्पलीवर्धमानम् द्र० 'रसायन' ( सुचि. ५.१२ )
वर्धमानपिंपळीरसायन. वातव्याधि इ० नाशक आणि बलकर, या प्रयोगात वाढत्या प्रमाणात पिंपळीचे सेवन करावयाचे असते.

**पिप्पल्यादि**–वि., पिप्पलीति प्रथमशब्दारब्धः द्रव्यगण० पिप्पलीपिप्पलीमूलचव्यचित्रकशृङ्गवेरमरिचहस्तिपिप्पलीहरेणुकैलाजमोदेन्द्रयवपाठाजीरकसर्षपमहानिम्बफलहिङ्गुभार्ङ्गीमधुरसातिविषावचाविडङ्गानि कटुरोहिणी चेति, अयं कफहरः प्रतिश्यायानिलारुचीर्हन्ति तथा दीपनो गुल्मशूलघ्न आमपाचनश्च ( सुसू. ३८.२२–२३ )
पिप्पल्यादिगण. पिंपळीने ज्या गणाची सुरुवात झाली आहे असा. पिप्पल्यादिगणाची औषधे. पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ, मिरी, गजपिंपळी, रेणुकबी, वेलदोडा, अजमोदा, इंद्रजव, पहाडमूळ, जिरे, मोहरी, मोठा निंब, गेळफळ, हिंग, भारंगमूळ, मोरवेल, अतिविष, वेखंड, वावडिंग, कुटकी, ही सर्व कफहर पडसे, वात, अरुचि, गुल्म-शूल नाशक, आमपाचक, दीपक.

**–घृत**–न., सिद्धघृत० उत्तरबस्तिद्वारा रक्तविभेदनार्थं रक्तगुल्मे समुपदिष्टम् ( सुउ. ४२.२१ ) श्वासकास-हृत्पार्श्वग्रहण्यादिरोगेषु प्रशस्तम्
( चचि. १८.३६–३८ )
पिप्पल्यादिघृत. उत्तरबस्तीने रक्तस्राव व्हावा म्हणून रक्तगुल्मात उपयुक्त. श्वास, खोकला, हृदय, फासळीचे रोग, ग्रहणी इत्यादीवर चांगले.

**पिप्पल्यादिपञ्चवर्ग**–पु., द्रव्यगण० पञ्चकोलम्, पिप्पली-पिप्पलीमूलचव्यचित्रकनागरम्; वर्गोऽयं कृमीणां प्रकृतिविघातकः ( चवि. ७.२१ )
पिप्पल्यादिपंचवर्ग, पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ. हा वर्ग कृमींच्या कारणांचा–कफादि-काचा नाश करणारा आहे.

**पिप्पल्यासव**–पु., आसुत० अयं जङ्गालानां धन्वजानां चानुपानार्थमुपयुज्यते ( सुसू. ४६.४३३ )
पिप्पल्यासव निर्जल प्रदेशातील जांघ पुष्ट असणाऱ्या प्राण्यांच्या मांसावर अनुपान म्हणून योजतात.

**पिप्रक्षु**–वि., प्रष्टुमिच्छुः ( चचि. २१.१४६ )
प्रश्न करण्याची इच्छा असणारा.

**पिप्लु**–पु., त्वग्रोग० जटुला, (चक्र) यस्य पित्तं प्रकुपितं शोणितं प्राप्य शुष्यति । तस्य पिप्लवो जायन्ते ( चसू. १८.२५ ) पिप्लवरोग त्वचारोग, लासे.
पित्त रक्तात येऊन शुष्क करून लासे करते.
लक्षण० पिडका ( चइ. १.११ ) फोड.

**पिप्लुत**–वि., अल्पाल्पग्रन्थियुक्तम् (कासखिल अ.१५.७)
लहान लहान ग्रंथियुक्त.

**पिम्परि**–पु., वनस्पति० प्लक्षः ( रा. ११.१२६ ) पिंपरी.

**पियाल**–पु., वनस्पति० सारद्रुमः (ड. सुसू.३८.४८-४९) द्राक्षारसप्रियः खरस्कन्धाख्यः ( अरु. ) चारः ( हे. अहसू. १५.४१ ) प्रियालफलं गुरु शीतलं बृंहणं स्निग्धं कफशुक्रकरं दाहक्षतक्षयहरं च ( असंसू.७. )
चारोळी जड, थंड, पौष्टिक, स्निग्ध, कफशुक्रकर, दाह, जखम, क्षय हारक.

**–ज**–न., तैल० प्रियालतैलम्, इदं गुरुं शीतलं श्लेष्मलं केश्यं वातपित्तहरं च ( असंसू. ६. )
चारोळीचे तेल जड, थंड, कफकर, केसांना हितकर, वातपित्तहारक.

**पिलिपिच्छिका**–स्त्री., रेवतीग्रह० सा पक्षात्परे कालेऽपत्यं विनाशयति ( का. रेवतीक. अ. ४७ )
बालांना उपद्रव देणारा, रेवती नावाचा ग्रहप्रकार. याच्यामुळे जन्मानंतर १५ दिवसांनी मूल नष्ट होते.

**पिल्ल**–न., नेत्ररोग० ( चचि. २६.२४९ ) दीर्घकालानु-बन्धी नेत्ररोगः, ते चाष्टादश, पित्तोत्क्लिष्टवर्त्म, कफोत्क्लिष्टवर्त्म, रक्तोत्क्लिष्टवर्त्म, निचयोत्क्लिष्ट-वर्त्म, पोथकी, बिसवर्त्म, कुकूणकः, पक्ष्मोपरोधः, पूयालसः शुष्काक्षिपाकः, सशोफोऽम्लोषितः, पित्तकफरक्ताभिष्यन्दास्त्रयः, पित्तकफरक्ताधि-मन्थास्त्रयः ( असंउ. २० ) बहुशो वर्त्माभिलेखनं रक्तस्रुतिः, आभीक्ष्ण्येन विरेचनञ्च पिल्लरोगे प्रयोज्यम् ( असंउ. २० )
पिल्लनांवाचा नेत्ररोग. हे १८ प्रकारचे नेत्रविकार आहेत. (१) पित्तोत्क्लिष्ट, (२) कफोत्क्लिष्ट, (३) रक्तोत्क्लिष्ट (४) सन्निपातोत्क्लिष्ट (५) कुकूणक (६) पक्ष्मोपरोध (७) शुष्काक्षिपाक (८) पूयालस (९) बिसवर्त्म (१०) पोथकी (११) अम्लोषित (१२) अल्पशोफ (१३) पित्ताभिष्यंद (१४) कफाभिष्यंद (१५) रक्ताभिष्यंद (१६) पित्ताधिमंथ (१७) कफा-धिमंथ (१८) रक्ताधिमंथ हे रोग फार दिवस राहाणारे आहेत. पुनःपुन्हा होतात, त्याची सामान्य चिकित्सा. पापण्या घासणे, रक्तस्रुति, वारंवार विरेचन देणे.

**पिल्लिका**–स्त्री. नेत्ररोग० ( काखिल अ. १३.२४ )
पिल्लिका नावाचा नेत्ररोग.

**पिल्लिमा**–स्त्री., नेत्ररोग० ( का. षट्कल्प.१८ ) नेत्ररोग.

**पिशङ्ग**–वि., ताम्रवर्णः ( इन्दु. असंउ.४३ ) ताम्रवर्ण.

**पिशाच**–पु., ग्रह० पिशिताशनः ( सुसू. ५.२१ ) भूताधिपतिः ( असंउ. ७ ) देवयोनिः (चनि.७.१०) पिशाचग्रहजुष्टलक्षणानि–यो विकृतदर्शनो दुर्बलः, कर्कशो बहुजल्पको दुर्गन्धोऽत्यशुचिरतिलोलो बहु-भक्षको विजनसेवी, शीताम्बुसेवी, रात्रिसेव्युद्वि-ग्नो रुदनाटनशीलः स पिशाचाविष्ट इति ज्ञेयम्
( सुउ. ६०.१५ )
भूत. मांस खाणारा भूताधिपति देवयोनि पिशाचाने झपाटलेल्याची चिन्हेः- वेडे वाकडे पाहतो, अशक्तपणा, कर्कश आवाजाने फार बोलतो, सर्वांगाला दुर्गंधि येणारा, घाणेरडा, हावरा, खादाड, वारा घेणारा, थंड पदार्थ घेणारा, रात्री खुशीत असणारा, उद्विग्न असणारा, रडणे आणि फिरणे ह्या क्रिया सतत करणारा पिशाचाने झपाटला आहे असे समजावे.

**( पिशाची )**–स्त्री., रेवतीग्रह० इयं सद्योजातमृतापत्या घोरा मांसादी च ( का. रेवतीकल्प. ४३.४४ )
ह्या प्रकारच्या रेवतीग्रहबाधेने मूल जन्मतःच मरण्याची खोड स्त्रीला लागते.
वनस्पति० गन्धमांसी ( ध. ३.४७ ) जटामांसी.

**–पञ्चवर्णी**–पु., वनस्पति० करवीरः ( र. ३०.७० ) कण्हेर.

**पिशाचोन्माद**–(परिव०) पु., रोग० तल्लक्षणानि–यः अस्वस्थचित्तः स्थानमलभमानो नृत्यगीतहासी बद्धाबद्धप्रलापी संकरकूटमलिनरथ्याचेलतृणाश्मकाष्ठाधिरोहणरतिः भिन्नरूक्षस्वरो नग्नं विधावन्नैकत्र तिष्ठन्दुःखान्यावेदयान्नष्टस्मृतिः स पिशाचोन्मत्तो ज्ञेयः ( चचि. ९.२० )
पिशाचोन्माद या विकारात रोगी अस्वस्थचित्त राहण्यास जागा नाहीं असे बडबडतो, नाचतो, गातो, विसंगत बडबडतो, अडचणीत उकिरड्याच्या घाणीत, गुंतवळ असलेल्या ठिकाणी, गवतावर दगडावर चढण्यावसण्याची आवड असते. आवाज फुटतो, नग्न अवस्थेत धावतो, एका जागेवर थांबत नाही, दुःखकारक घटना सांगतो, आठवण नसते.

**–पिशित**–न., मांसम् ( सुचि. ५.७ ) मांस.

**( पिशिता )**–स्त्री., वनस्पति० जटामांसी ( ध. ३.४५ ) जटामांसी.

**पिशिताशिन्**–वि., मांसादः ( खगः ) ( सुसू. ४६.१३४ ) मांस खाणारा ( पक्षी ).

**पिशुन**–न., वनस्पति० कुङ्कुमम् ( ध. ३.१२ ) केशर.

**( पिशुना )**–स्त्री., वनस्पति० स्पृक्का ( ध. ३.६२ ) पिंडिका.

**पिष्ट**–पु., पिण्डः ( र. ८.७२-७३ ) गोळा.
वि., चूर्णीकृतम् ( सुचि. २७.८ ) खल्वे पेषितम् ( र. २.८७ ) चूर्ण केलेले, खलात घोटलेले.
खनिज० सीसकम् ( र. २३.२५ ) शिसे.

**( पिष्टि )**–स्त्री., समगन्धपारदस्य दुग्धेन सह पेषणाज्जाता इत्येकप्रकारका ( र. १७ ) द्वादशगुणितेन द्वादशभागेन च पारदेन सह मिश्रितो तीव्रातपे संमर्दनात् नवनीतरूपः संजातो गन्धकः ( र. ८.७ )
पिष्टी. समगंधकाबरोबर व दुधाबरोबर घोटण्याने होणारी पारदाची लोण्यासारखी पिष्टी. हा एक प्रकार; आणि गंधकाच्या $\frac{1}{12}$ पारा मिश्र करुन तीव्र उन्हात घोटण्यामुळे लोण्यासारखी मऊ होणारी पिष्टी (कज्जली).

**–पचन**–न., पात्र० पिष्टं पिण्डादिरूपापन्नं पच्यते अनेन इति पिष्टपचनम्, कटाहः ( सुचि.२७.८ ) कढई.

**–मय**–वि., पिष्टविकारः (चसू. ५.९) पिठाचे पदार्थ.

**–मांस**–(परिव०) न., कुट्टितं मांसम् ( सुसू. ४६.३५७-३५८ ) ठेचलेले मांस.

**–मेह**–पु., रोग० कफजप्रमेह० ( सुनि. ६.१० ) पिष्टमेह, कफज मेह.
हृष्टरोमा पिष्टमिव सान्द्रं सितं च मेहति। ( असंनि. १०.१४ ) तस्य चिकित्सा, हरिद्रादारुहरिद्राकषाय उपयुक्तः ( सुचि. ११.९ )
**पिष्टमेहाची लक्षणे**—पिठासारखे पांढरे, घट्ट असे लघवीला होते. लघवीला होताना अंगावर शहारे येतात. त्यावरील उपचार–हळद व दारुहळद यांचे चूर्ण किंवा काढा.

**–विकृति**–स्त्री., पिष्टजा नाम पिष्टसाधिता विकृतिर्विकारो यथा पैष्टी ( सुरा ) पिष्टमयमाहारद्रव्यम् ( चसू. ५.५ )
पिठापासून तयार केलेली पैष्टी–सुरा–( दारू ).

**–स्वेदन**–न., पात्र० पिष्टं शाल्यादिचूर्णं स्विद्यतेऽस्मिन्निति पिष्टस्वेदनं भाण्डम् (अरु० असंउ. ४८) साळी वगैरेचे पीठ शिजविण्याचे भांडे.

**–स्वेदनविधि**–पु., यथा पिष्टकं तोयपरिपूरितपात्रे-परिदत्ततृणादिसंस्थितं स्वेद्यते, तथा तत् स्वेदनीयमित्यर्थः ( चक्र. चचि. १(१)७.८ )
मोदकपात्रात घालून उकडण्याचा विधि– भांड्यात पाणी घालून वर गवताची पाने इ० ठेवून त्यावर मोदकादि खाद्यपदार्थ वाफेवर उकडणे.

**पिष्टक**–पु., नेत्ररोग० नेत्रशुक्लभागगतोऽयम् अस्मिन् रोगे शुक्लभागे पिष्टशुक्लो बिन्दुर्भवति (सुउ. ४.८ सुउ. १.३५)
डोळ्यामध्ये पांढऱ्या बुबुळावर पडणारे पिठासारखे पांढरे ठिपके.
न., छगणम्, ग्राम्योपलमरण्योपलम् ( र. ७.८ ) रानशेणी, शेणी, गोवऱ्या.

**पिष्टान्न**–न., तण्डुलादिपिष्टजमन्नम् ( ड. ) ( सुउ. ५४.४,१७ )
तांदळाचे वगैरे पिठापासून तयार झालेले अन्न.

**पिष्टि**–स्त्री., पिष्टी (र.८.८) पिष्टी, सूक्ष्म चूर्ण, कज्जली.

**–बन्ध**–( परिव० ) पु., पारदबन्ध० तीव्रातपे प्रगाढ-

**मर्दनान्नवनीतसमो जातः। प्रक्रियाऽत्र द्वादशांशं पारदमेकांशं गन्धकं च त्रुटिशो मुहुर्मुहुः खल्वे दत्वा तीव्रातपे मर्दयेत्** ( र. ११.७० )
पिष्टिबन्ध. पाऱ्याचा एक बंध. थोडे थोडे वारंवार बारा भाग पारा व एक भाग गंधक मिश्रण करीत जाऊन तीव्र उन्हात खूप खल करून लोण्या-सारखे होणारे मिश्रण.

**पिष्टिक**–न., **अरण्योपलम्** ( र. १०.६६ ) रानशेणी.

**( पिष्टिका )**–( परिव० ) स्त्री., **पारदबन्ध० पिष्टिबन्धः** ( र. ११.७० ) पिष्टीबंध.
**पिण्डिका** ( र. १०.५२–५३ ) तुंबा गोळा.

**पिष्टिकोद्भव**–न., **वनस्पति० तवक्षीरम्** ( रा. ६.८८ ) वंशलोचन.

**पिष्टौण्डि**–स्त्री., **वनस्पति० श्वेताम्ली,** ( रापरि. ४.३७ ) एक वनस्पती.

**पिहित**–वि., **पिधानेन रुद्धम्** ( सुउ. २४.६ )
**आच्छादितम्** ( अहसू. १९.१५ )
आच्छादिलेले, झाकणाने बंद केलेले.

**पीटक**–न., **खनिज० अभ्रकम्** (ध.परि. ६.३-४) अभ्रक.

**पीठ**–न., **आसनम्** ( अहसू. २२.२७ ) बैठक.
**–सर्पिन्**–वि., **पङ्गुः** ( चक्र. चसि. २.२१ ) पांगळा.

**पीठोपमपाली**–वि., **यस्य तु पालिद्वयं मूलत एव छिन्नं भवति स पीठोपमपालिः, निर्वेधिमः पञ्चदशकर्ण-बन्धाकृतीनामेकतमः** ( सुसू. १६.१० )
कानाच्या दोन्ही पाळ्या ज्याच्या मुळांतूनच तुटल्या आहेत असा. अशा स्थितीत 'निर्वेधिम' नावाचा बंध कर्णबंध म्हणून उपयोगात आणावयाचा असतो.

**पीडन**–वि., **लेप० सूक्ष्मास्ये व्रणे रूक्षैः पिच्छिलैश्च पीडनो लेपो विधीयते पीड्यते निष्पीड्यते सूक्ष्मास्यव्रण-वस्तु अनेनेति पीडनो ( लेपः )** ( असंउ. ३० )
व्रणाचे तोंड लहान असता रुक्ष व बुळबुळित लेप लावून त्या लेपाने व्रणातील पू, तो दाबला जाऊन बाहेर निचरून जाईल या क्रिया करणाऱ्या लेपाचे नाव.
न., **मर्दनम्** ( चसू. १८.४ ) **अङ्गुल्यादिना पीडनं नाम निष्पीडनम्** ( ससू. ७.१७ ) **व्रणस्य षष्ट्यु-पक्रमेष्वेकः** ( सुचि. १.८ ) **नमनोन्नमनपरिवर्त-नादि.** ( सुचि. ३.१८ )
मर्दन. बोटाने वरून खाली किंवा खालून वर हळू हळू दाबणे इ० व्रणाच्या ६० उपक्रमापैकी एक.
**पीडनद्रव्यम्,** ( सुचि. १.३६ )
पीडन लेपासाठी लागणारी द्रव्ये.

**अभिघातः** ( सुनि. १५.३ )
आघात, ताडन, ठोका लागणे.
**पीडा, दुःखम्** ( का. बालग्रहचि. ) पीडा.

**पीत**–वि., **पीतवर्णः हारिद्राभः** ( सुसू. १४.२१ )
पिवळा रंग, हळदीप्रमाणे.
**आसवादिना भावितं, शोषितं च** ( र. ३०.१–२ )
आसवादिकांनी भावना दिलेले व सुकवलेले अभ्र-कादि धातु.
पु., **खनिज० गैरिकम्,** (ध.परि.६.१४) काव, गेरू.
**गौरीपाषाणभेदः द्र० 'गौरीपाषाण'** ( र. ३.१३८ )
सोमल.
**वनस्पति० शाखोटः,** ( रापरि. ९.३० ) साग.
**अङ्कोटः** ( रा. ९.३८४ )
पिस्ता आक्रोड पिवळ्या नाराचा तांबड्या फळांचा सुगंधी फुलांचा वृक्ष.
न., **पद्मकम्** ( रा. १२.१४९ ) पद्मकाष्ठ.
न., **विष० हारिद्रं विषम्,** ( र. १०.८५ )
पिवळे विष.
न., **वनस्पति० कुसुम्भम्** ( ध. ६.११८ ) करडई.
**पद्मकेसरम्** ( रा. १०.१६२ ) पद्मकेसर.

**( पीता )** स्त्री., **वनस्पति० कुरण्टकः** ( रा. १०.४१९ )
कोरांटा, कोरांटी.
**तेजोवती** ( रा. ३.३९४ ) मालकांगोणी.
**दारुहरिद्रा** ( ध. १.५९ ) दारुहळद.
**प्रियङ्गुः** ( रा. १२.२९ ) गव्हला.
**मातुलुङ्गभेदः, वनबीजपूरकः** ( रा. ११.३४ )
महाळुंगाचा प्रकार.
**शिंशिपा, कुशिंशपा** ( रा.९.२०१ ) शिसव.
**सुवर्णकदली** ( रा. ११.११४ ) सोनकेळ.
**हरिद्रा** ( ध. १५४ ) हळद.
**भैषज्य० गोरोचना** ( रा. १२.३४ ) गोरोचन.
**आग्नेयी=लूता० इयं स्वेदजा वर्तते। सा पित्तवि-कारदा भवति** (असंउ. ४४) **दंशलक्षणानि–विण्मूत्र-दंशक्लेदाक्षिदर्शनानां पीतत्वम्, मूर्च्छाच्छर्दिशिरो-दुःखज्वरारोचकशूला भवन्ति** ( असंउ. ४५ )
घामापासून उत्पन्न होणारी ही लूत–विषारी किडा आहे. याने पित्ताचे विकार होतात. हा किडा चाव-ल्याने त्या माणसाचे मूत्र, पुरीष, घाम, डोळे ही पिवळी दिसतात, त्यालाही सर्व पिवळे दिसते. मूर्च्छा ओकारी, डोकेदुखी, चव नसणे, अत्यन्त शूल ही उत्पन्न होतात,

**-कर्मन्**-न., पीतवर्णसुवर्णोत्पादकं कर्म ( र. २.१० ) सोने करण्याचे कर्म, किमया.

**-काष्ठ**-पु., वनस्पति० **हरिद्रुः** ( रापरि. ९.२६ ) दारुहळद.
**कालीयकम्** ( ध. ३.८ ) काळा अगरू.

**-कीलका**-स्त्री., वनस्पति० **आवर्तकी** ( ध. १.१९८ ) चांभारआवळी.

**-कीला**-स्त्री., वनस्पति० **आवर्तकी** ( रा. ३.२९६ ) चांभारआवळी.

**-कुरव**-पु., वनस्पति० **किङ्किरातः** ( रा. १०.४१५ ) काडेकिराईत.

**-कुसुम**-पु., वनस्पति० **किङ्किरातः** ( रा. १०.४१५ ) काडेकिराईत.

**-गन्ध**-न., वनस्पति० **कालीयकम्** ( रा. १२.१५ ) काळा अगरू.

**-चन्दन**-न., वनस्पति० **दारुहरिद्रा** ( ध. १.५७ ) दारुहळद.
**कालीयकम्** ( रा. १२.१५ ) काळा अगरू.

**-तण्डुल**-पु., वनस्पति० **प्रियङ्गुः** ( ध. ६.९० ) गव्हला.

**( -तण्डुला )**-स्त्री., वनस्पति० **बृहती, बृहती-भेदः सर्पतनुः** ( रा. ४.१२३ ) डोरली.
डोरलीचा प्रकार.

**-तैला**-स्त्री., वनस्पति० **तेजोवती** ( रा. ३.३९४ ) मालकांगोणी.

**-दारु**-पु., वनस्पति० **हरिद्रुः** ( रा. परि. ९.२६ ) दारुहळद.
**देवदारु** ( चसि. ९.८; सुचि. ३१.५ ) देवदार.
**दारुहरिद्रा** ( सुचि. १९.१३; ध. १.५९ ) दारुहळद.

**-दुग्धा**-स्त्री., वनस्पति० **काञ्चनक्षीरी** (रा.५.३६३) पिसोळा, पिवळा धोतरा, स्वर्णक्षीरी.

**-द्रु**-पु., वनस्पति० **सरलः** (रा.१२.१३६) राळवृक्ष.
**देवदारु** ( चक्र. चचि. १०.४३-४४ असंउ. १० ) देवदार.
**दारुहरिद्रा** ( ध. १.५७ ) दारुहळद.

**-नेत्रत्व**-न., लक्षण० **हारिद्रनेत्रत्वम्** (सुउ.३९.३२) पिवळे डोळे.

**-पादक**-पु., वनस्पति० **टिण्टुकः** ( रा. ९.१४२ ) टेंटू.

**-पुष्प**-पु., वनस्पति० **चम्पकः** ( रा. १०.२३९ ) चाफा पिवळा.
**कोविदारः** ( रा. १०.२९४ ) कांचन.
न., वनस्पति० **आहुल्यम्** ( रापरि. ४.३४ ) तरोटा, तरवड.

**-(पुष्पा)**-स्त्री., वनस्पति० **कोशातकी** (ध. १.१८९; रा. ७.२८८ ) दोडका.
**कारवल्ली** ( रा. ७.२७८ ) कारले, कारल्याची वेल.
**झिंझिरीटा** ( रापरि. ४.५३ ) झिंझुर्टी, झिञ्झीरिटा, चिकणाप्रकार.
**आवर्तकी** ( ध. १.१९८ ) आवर्तकी, चांभारआवळी.
**आढकी** ( ध. ६.९३ ) मटकी, तूर.

**-(पुष्पी)**-स्त्री., वनस्पति० **महाबला** ( ध. १.२८२ ) मोठा चिकणा.
**शणपुष्पी** ( रा. ४.२९८ ) ताग.
**इन्द्रवारुणी** ( रा. ३.३७२ ) इंद्रवारुणी, कवंडल.
**त्रपुसम्** ( रा. ७.२४६ ) वाळुक, काकडी.

**-पुष्पीका**-स्त्री., वनस्पति० **वालुकम्** ( रा. ७.२५० ) वाळूक, काकडी.

**-फल**-पु., वनस्पति० **कर्मारः** ( रापरि. ११.१३ ) कर्मरक ( कमरक ? )

**-बीजा**-स्त्री., वनस्पति० **वनमेथिका** ( रा. ५.१८५ ) रानमेथी.

**-भद्रक**-पु., वनस्पति० **किङ्किरातः** ( ध. ५.१५६ ) काडेकिराईत.

**-भृङ्गराज**-पु., वनस्पति० **भृङ्गराजभेदः** ( रा. ४.२१ ) द्र० ' भृंगराज ' माका.

**-माक्षिक**-न., खनिज० **माक्षिकम्** ( रा. १३.२०९ ) माक्षीक.

**-मुद्ग**-पु., धान्य० **कुलित्थः** ( ध.६.१०५ ) कुळीथ.
**मुद्गप्रकारः** ( सुसू. ४६.२७ ड. ) मुगाचा प्रकार.

**-मूत्रत्व**-न., लक्षण० **हारिद्रमूत्रत्वम्** ( सु. उ. ३९.३२ ) पिंवळी लघवी.

**-मूलक**-न., वनस्पति० **गर्जरम्** ( ध. ४.६९ ) गाजर.

**-यूथिका**-स्त्री., वनस्पति० **यूथिकाभेदः** ( ध. ५.१४९ ) द्र० ' यूथिका ' जुईचा प्रकार.

**-यूथी**-स्त्री., वनस्पति० **यूथिकाभेदः** ( रा. १०.२५२ ) द्र० ' यूथिका ' जुईचा प्रकार.

**-रक्त**-पु., वनस्पति० **पद्मकः** ( ध. ३.८८ ) कमळ.

**-रम्भा**-स्त्री., वनस्पति० सुवर्णकदली (रा. ११.११५) सोनकेळ.

**-राग**-न., भैषज्य० सिक्थकम् (रा. १३.१७४) मेण.

**-रूपदर्शन**-न., लक्षण० सर्वेषां वस्तूनां पीताभत्वेन दर्शनम् (ड. सुक. ४.३७) सर्ववस्तू पिवळ्या दिसणे.

**-वर्ग**-पु., रसकर्मोपयोगी वर्गः तत्र च पलाशः, परिव्याधो हरिद्रा, दारुहरिद्रा (र. १०.९२) पाऱ्यापासून अन्य धातूचे सोने करण्याच्या प्रक्रियेत उपयुक्त औषधीवर्ग. पळस, पांगारा, दारुहळद, हळद, वगैरे.

**-वर्ण**-न., वनस्पति० कालीयकम् (ध. ३.२७) पिवळे चंदन. कालीयक.

**-वर्णक**-न., वनस्पति० शीर्णवृन्तम् (ध. १.१७९) देठ गळलेला.

**-विट्त्व**-न., लक्षण० हारिद्रवर्चस्त्वम् (सुउ. ३९.३२) मळाला पिवळेपणा असणे.

**-वृक्ष**-पु., वनस्पति० टिण्टुकः (रा. ९.१४१) टेंटू.

**-सार**-पु., निर्यास० तुरुष्कः (रा. १२.३६) ऊद, धूप.
वनस्पति० अङ्कोटः (ध. १.२५८) अंकोट.

**-सारक**-पु., वनस्पति० निम्बः (रा. ९.४४) निंब.

**पीतक**-पु., वनस्पति० नन्दीवृक्षः (रा. १२.३१) नांदुरखी, नंदीवृक्ष.
हरिद्रुः (रापरि. ९.२६) दारुहळद.
टिण्टुकः (रा. ९.१४३) टेंटू.
किङ्किरातः (ध. ५.१५६) काडेकिराईत.
धान्य० हरिद्राभः शालिः द्र० 'शालि' (सुसू. २०.५) पिवळी साळ.
षष्टिकभेदः द्र० 'षष्टिक' (सुसू. ४६.८) साठेतांदुळाचा प्रकार.
न., वनस्पति० दारुहरिद्रा (ध. १.५८) दारुहळद.
पद्मकम् (रा. १२.१४९) कमळ.
गृञ्जनम् (ध. ४.३७) गोल पिवळा मुळा.
गर्जरम् (ध. ४.६९) गाजर.
कालीयकम् (रा. १२.१५) पिवळे चंदन.
लोध्रभेदः, पीतलोध्रम् (र.२३.४०) द्र० 'लोध्र' पिवळा लोध्र.
काष्ठागरु (रा. १२.४२) काष्ठ-अगरु.
कुङ्कुम् (ध. ३.१२) केशर.



खनिज० सुवर्णम् (ध.६.२) सोने.
अभ्रकम् (ध. परि. ६.३-४) अभ्रक.
माक्षीकम् (रा. १३.२०९) सुवर्णमाक्षिक.
हरितालम् (ध. ७.११९) हरताल.
कृत्रिमधातु० पित्तलम् (रा. १३.१७) पितळ.

**पीतिका**-स्त्री., लूता० तद्दष्टलक्षणानि-स्थिरा पिडका, छर्दिर्ज्वरः शिरःशूलमक्षिरक्तत्वं च (सुक. ८.१०७) पिवळी लूत. विषारी किडा. तो चावला असता स्थिरस्वरूपाचे फोड, ओकारी, ताप, डोके दुखणे आणि डोळे लाल होणे ही चिन्हे होतात.
वनस्पति० यूथिकाभेदः (ध. ५.१४९) द्र० 'यूथिका' जुईचा प्रकार.
कूष्माण्डिका (१.१८३) कोहळा.
हरिद्रा (ध. १.५४) हळद.
दारुहरिद्रा (रा. ६.८३) दारुहळद.
शतपुष्पा (ध. २.१) बडीशेप.
खनिज० स्फटिकाभेदः पीतवर्णा स्फटिका (र. ३.६७-६८) द्र० 'सौराष्ट्री' पिवळी-तुरटी.

**-चूर्ण**-न., योग० मनःशीलयवक्षारहरितालसैंधवादिसाधितम् कण्ठमुखरोगेषूपयुक्तम् (चचि. २६.१९६-१९७) मुखरोगात सांगितलेला एक औषधियोग. मनशीळ, हरताळ, जवखार सैंधव इत्यादींनी युक्त.

**-द्रुम**-पु., वनस्पति० हरिद्रुः (रा. परि. ९.२६) दारुहळद.

**पीतनक**-पु., वनस्पति० आम्रातकः (ध. ५.१२) आंबाडा, आंबाडी.

**पीतसा**-स्त्री., वनस्पति० कर्कटी (रा. ७.२५२) काकडी.

**पीताङ्ग**-पु., वनस्पति० टिण्टुकः (रा. ९.१४२) टेंटू.

**पीताभ**-न., वनस्पति० जीरकम् (ध. २.६६) जिरे.

**पीताम्लान**-पु., वनस्पति० किङ्किरातः (रा. १०.४१५) काडे किराईत.

**पीताह्व**-न., वनस्पति० दारुहरिद्रा (ध. १.५८) दारुहळद.

**पीनगन्धर्व**-पु., -वनस्पति० एरण्डः (र ३०.१६) एरंड.

**पीनवदना**-वि., पुष्टं वदनं यस्याः सा (सुशा. ३.७) पुष्ट चेहरा असणारी. गाल, डोळे, इ० खोल गेले नाहीत, पुष्ट आहेत असा चेहरा असलेली.

तदाऽऽगन्तुजं पूयरक्तं जानीयात् ( सुउ. २२.१० ) ( असंउ. २३ )
नासागत ( नाकात होणारा ) पूयरक्त हा विकार दोन प्रकारचा आहे. (१) नाकामध्ये पित्त व रक्ताच्या प्रकोपाने दोषदुष्टि होते तेव्हां पू व रक्त यांचा नाक कान अथवा तोंडातून स्राव सुरू होतो. हा दोषज पूयरक्तविकार. (२) कपाळावर मार लागल्यामुळे जो रक्तस्राव होतो तो रक्तस्राव दीर्घकालाने पुवात रूपांतरित होऊन "पूयरक्त" निर्माण होते तो आगंतु पूयरक्तविकार.

**–स्राविणी**–वि., **पूयं मुहुर्मुहुः स्रवन्ती ( योनिः )** ( सुउ. ३८.२६ )
वारंवार पुवाचा स्राव होणारी योनि.

**पूयालस**–पु., **नेत्ररोग॰ कनीनसंधौ पूयस्राव्याध्मायी सवेदनः शोफसंरम्भपूर्वकः सूक्ष्मो व्रणः** ( असंउ. १२ ) **संनिपातजोऽयं साध्यश्च** ( सुउ. २.४ ) **स्नेहस्वेदपूर्वकमुपनाहनं तथा च रक्तमोक्षणं हितम्, नेत्रपाकघात्यान्तर्बाह्यशुद्धिकरः कृत्स्नो विधिर्विधेयः** ( सुउ. १२.४५ )
**पूयालस**—डोळ्याच्या कनीनसंधीच्या ठिकाणी प्रथम सूज येते, पुढे तेथे बारिक व्रण होतो. त्यातून पुवाचा स्राव येतो. ठणकाहि असतो. हा जरी सान्निपातिक असला तरी साध्य आहे. स्नेहन, स्वेदन, पोटीस तसेच रक्तस्राव, हितकर, व नेत्रपाक नाहीसा करणारा अन्तर्बाह्य शुद्धि करणारा सर्व विधि करावा.

**पूयास्राव**–पु., **नासारोग॰ पूयरक्ताभ्यां युक्तः स्रावः** ( चचि. २६.१४६; र. २४.२० )
नाकाचा विकार, रक्तपुवाचा स्राव.
**नेत्ररोग॰ सास्रा वातादिमला वर्त्मसंधिकनीनकात्-सास्रत्वङ्मांसपाकतो मुहुः पूयं स्रावयन्ति** ( सुउ. २.६; असंउ. १३ ) **त्रिदोषजोऽसाध्यो नेत्र-नाडीभेदः** ( सुउ. २.६ )
नेत्ररोग. सरक्त वातादि दोष पापण्याच्या सांध्यांतून त्वचा व मांस यांचा पाक झाल्याने वारंवार पू स्रवतो. हा त्रिदोषज; असाध्य. डोळ्याच्या नाडीव्रणापैकी.

**पूरक**–पु., **वनस्पति॰ मातुलुङ्गः** (रा. ११.२७) महाळुंग.

**पूरण**–न.; **उपक्रम॰ संतर्पणम्** ( चवि. ३.४२ )
डोळ्यावर औषध भरणे; नेत्रसंतर्पण.
**भरणम्** ( सुसू. २२.११ ) पोकळी भरून काढणे.
**तैलेन पूरणम्** ( चवि. २६.२२१ )
तेल इत्यादी स्नेहाने भरणे.

**पूराम्ल**–न., **वनस्पति॰ वृक्षाम्लम्** ( रा. ६.१४३ )
चिंच, आमसूल.

**पूर्ण**–वि., **पूरितम्, अरिक्तम्** (असंचि.२१) संपूर्ण, पुरेसे.

**–कोश**–पु., **आहारद्रव्य॰ द्रव्यपूरितान्तर्भागो भक्ष्य-विशेषो यथा यवपिष्टमयं भक्ष्यम्** ( असंचि. २१; सुचि. १०.५ )
विशिष्ट द्रव्ये आत भरून तयार केलेला खाद्यपदार्थ ( करंजी इ॰ सारखा ) जव वगैरेच्या पिठाचा खाद्यपदार्थ.

**–कोष्ठता**–स्त्री., **लक्षण॰ संचितकफादिदोषेण कोष्ठस्य पूर्णत्वं व्याप्तत्वं वा** ( सुसू. २१.१८ )
पोटात कफादिकांचा साठा होण्याने जडत्व येणे.

**–कोष्ठा**–स्त्री., **वनस्पति॰ मुस्तभेदः नागरमुस्ता द्र॰ 'मुस्त'** ( रा. ६.६२ ) नागरमोथे.

**–चन्द्र**–पु., **पारदयोग॰ सूताभ्रलोहशिलाजत्वादि-सिद्धः बृंहणोऽयम्** ( र. १८.१९० )
पूर्णचंद्रोदय नावाचे औषध. पारा, अभ्रक, लोह, शिलाजतु, इ॰ युक्त, पौष्टिक.
**पारदयोग॰ सूतगन्धकशंखमौक्तिकादिसिद्धः, ग्रहण्यर्शःस्त्रीरोगादिहरोऽनुपानभेदेन** ( र. २७.१३०-३३ )
पारा गंधक शंख मोती इ॰ युक्त. ग्रहणी मूळव्याध स्त्रीरोग इत्यादी नाशक.

**–बीज**–पु., **वनस्पति॰ मातुलुङ्गः** ( रा. ११.२६ )
महाळुंग.

**पूर्णक**–पु., **वनस्पति॰ तिलकः** ( ध. ५.१५८ ) तिळवा.

**पूर्णाक्ष**–पु., **महर्षि॰ रसाहारसम्यग्विनिश्चयार्थमुपविष्टानां आत्रेयभद्रकाप्यादीनां महर्षीणामन्यतमः** [illegible] ( चसू. २६.३ )
रसांच्या आहाराविषयी निश्चय करण्याकरिता जमलेल्या ऋषींपैकी एक ऋषि.

**पूर्णामृत**–पु., **कश्चित प्राचीनो रसाचार्यो योगीन्द्रश्च** ( र.२२.१३ ) पूर्णामृत नावाचा रसशास्त्री व योगी.

**पूर्व**–वि., **आदिमम्, अव्यवहिताग्रवर्ति** ( सुसू. ५.३ )
पूर्वी ( आरंभी ) करावयाचे ( कर्म ).

**( पूर्वा )**–स्त्री., **दिग्॰** ( चसू. १४.४६ ) पूर्व, दिशा.

**–काय**–पु., **पूर्व कायस्य नाम नाभेरूर्ध्वभागः** ( सुचि. ६.४ ) नाभीच्या वरचा शरिराचा भाग.

**–जातिस्मर**–वि., **पूर्वजातीनां पूर्वजन्मनां स्मर्ता** ( सुशा. २.५७ ) पूर्वजन्मांचे स्मरण असणारा.

**-देश**-पु., भारतवर्षस्य पूर्वदिशि वर्तमानो देशः पूर्वदेशस्तु मधुरः शीतलो गुरुर्विज्ञेयः ( काखिल. २५.७-१२ )
पूर्वदिशेला असणारा देश. **गुण**— मधुर, शीत आणि गुरु.

**-देहानुभूत**-वि., पूर्वजन्मन्यनुभूतः ( सुशा. ४.३६ )
पूर्वजन्माचा अनुभव घेणारा.

**-पक्ष**-पु., तन्त्रयुक्ति० आक्षेपपूर्वकः प्रश्नः पूर्वपक्षः ( सुउ. ६५.२५ चसि. १२.४३ )
पूर्वपक्ष म्हणजे शास्त्राबद्दल असणारी शंका किंवा संशय दूर करण्यासाठी जो प्रश्न विचारला जातो तो.

**-भक्त**-वि., भक्तस्य पूर्वम् उपयुज्यमानम् ( सुउ. ९.१८ ) भैषज्यकाल० ( सुउ. ९.१८ )
भोजनापूर्वी औषध देण्याची एक वेळ.

**-रूप**-न., व्याधेः प्रागुत्पत्तिलक्षणम्, व्याध्युपलब्धि-कारणेषु एकम् ( चनि. १.८ ) पूर्वरूपं नाम येन भाविव्याधिविशेषो ज्ञायते, न तु दोषविशेषः तदुत्पत्स्यमानस्य व्याधेरलाभत्वाद् अव्यक्तं रूपम् ( असंनि. १.१०; सुसू. २१.३३ अहृसू. १२.६० )
व्याधि होण्यापूर्वीचे लक्षण. व्याधी जाणण्याच्या कारणापैकी एक कारण. ज्याच्या योगाने होणारा व्याधि जाणता येतो, विशिष्ट दोष मात्र जाणला जात नाही; अशा रोगाची आरंभी होणारी लक्षणे. व्याधी अल्प असल्याने अस्पष्ट असे जे लक्षण ते.

**-रूपीयाध्याय**-(परिव०) पु., अध्याय० (चइ. ५.१)
अध्यायाचे नाव. यात मरणसूचक पूर्वरूपे आहेत.

**-वात**-पु., पूर्वदिग्भवो वातः ( चचि. ९.७४ )
पूर्वेकडील वारा.

**-वेदना**-स्त्री., पूर्वरूपम् ( कासू. २५.१३ ) पूर्वरूप.

**पूर्वापराधज**-वि., पूर्वकर्मजः ( अहृसू. १२.५७ )
पूर्वकर्मामुळे झालेला.

**पूर्वाभिभाषिन्**-वि., पूर्वमभिभाषितुं शीलमस्येति प्रथम-संभाषणशीलः ( चसू. ८.१८ ) यदृच्छया सङ्गते सुहृदि तद्वचनात्पूर्वं कुशलप्रश्नादिकारी ( हे अहृसू. २.२६ )
प्रसन्न वदनाने स्वतः आरंभी बोलणारा, अचानक भेटलेल्या मित्र अथवा आप्ताशी स्वतःच कुशलप्रश्न इ० विचारून बोलणारा.

**पूर्वाह्ण**-पु., अह्नो दिवसस्य पूर्वभागः ( सुसू. ६.१४ )
दिवसाचा पहिला भाग.

**पूषन्**-पु., देवता० सूर्यः द्वादशादित्यानामन्यतमः ( र. ३०.१२५ ) सूर्यनारायण.

**पृथक्**-अव्य०, भिन्नम् ( ध. १.१३ ) वेगळे, निराळे.

**-त्व**-न., असंयोगः ( चसू. २६.२९ ) एकत्र न होणे.

**-पर्णी**-स्त्री., वनस्पति० मूर्वा (ध. १.१३) मोरवेल.
पृश्निपर्णी ( ध. १.९०; सुसू. ३७.२५ ) पिठवण.

**-बीज**-पु., वनस्पति० भल्लातकः ( रा. ११.२०२ )
बिब्बा.

**पृथशिम्ब**-पु., वनस्पति० टिण्टुकः ( ध. १.११५ ) टेंटु.

**पृथाज**-पु., वनस्पति० अर्जुन ( रा. ९.१९३ )
अर्जुन, अर्जुनसादडा.

**पृथिवी**-स्त्री., महाभूत० तमोबहुला इयम् (सुशा. १.२०)
भूमिः ( सुशा. १.२०; चवि. ३.२४ )
पृथ्वी नावाचे पंचमहाभूतापैकी एक महाभूत; हे तमोभूयिष्ठ आहे.
देवता० घ्राणस्याधिदैवतं पृथिवी ( सुशा. १.७ )
घ्राणेंद्रियाचे अधिदैवत; पृथ्वी.

**-रुह**-पु., वृक्षः ( सुसू. १६.२७ ) झाड, वृक्ष.

**पृथिव्यात्मक**-वि., पृथिवीगुणात्मकम् ( चशा. ४.१२ )
पृथ्वीगुणानी युक्त.

**पृथु**-वि., विस्तीर्णः ( सुसू. ३२.३ ) लांबरुंद, पसरट.
द्विकोणम् ( हे अहृसू. २८.१८ )
दोन कोन असलेले.
स्त्री., वनस्पति० हिङ्गुपत्री ( ध.२.३८ ) बाफळी.
मसूरिका ( ध. ६.९५ ) मसूर.
उपकुञ्ची ( रा. ६.९१ ) जिरे.

**( पृथ्वी )**-स्त्री., वनस्पति० श्वेतमन्दारकः (रा. १०.३१)
पांढरी रुई. मांदार.
पुनर्नवा ( रा. ५.४०४ ) पांढरी वसु, पुनर्नवा.

**-कन्दक**-पु., वनस्पति० गुण्ठः ( ध. १.८३ )
रोहिस गवताचा प्रकार.

**-च्छद**-पु., वनस्पति० दर्भभेदशरपत्रः ( रा. ८.२०९ ) द्र० 'दर्भ' दर्भाची पात.
आक्षोड: ( ध. ५.६० ) अक्रोड.

**-ता**-स्त्री., विस्तीर्णता ( सुनि. १५.१० ) लांबरुंदपणा.

**-दर्शिन्**-वि., विशालदर्शी पण्डितः, आयुर्वेदीयः आचार्यः ( सुश्रुतादिः ) ( सुशा. १.११ )
व्यापक दृष्टिकोन असणारे आयुर्वेदाचे शास्त्री सुश्रुताचार्य वगैरे.

**-पत्र**-पु., वनस्पति० लशुनभेदः महाकन्दः ( रा. ७.९६ ) द्र० ' लशुन ' लशुनप्रकार.

**-पलाश**-पु., वनस्पति० सठी ( ध. १.६१ )
आंबेहळद.

**-पलाशिका**-स्त्री., वनस्पति० सठी ( ध. १.६१ )
कचोरा.

**-फल**-पु., वनस्पति० बदरभेदः राजबदरः
( रा. ११.१६० ) द्र० 'बदर' बोरांचा प्रकार.

**-बीजक**-पु., वनस्पति० मसूरिका ( रा. १६.१४९ )
मसूर.

**-मुख**-वि., विस्तृतमुखम् ( अहसू. २८.२१ )
विस्तृत तोंड असणारा.

**-शिम्ब**-पु., वनस्पति० टिण्डुकः ( रा.९.१४१ )
टेंटु.

**पृथुक**-पु., आहारद्रव्य० आर्द्रशालिधान्यं मृदुभृष्टं मुसलाघातच्चिपटीभूतावयवं 'पृथुक' इत्युच्यते सोऽयं गुरुः स्निग्धो बृंहणः कफवर्धनश्च
( सुसू. ४६.४१५ )
पोहे. पोह्यांचे **गुण**- गुरु, स्निग्ध, पौष्टिक ( बृंहण ), कफवर्धक आहे. ओली थोडी वाफवलेली साळ मुसळाने कुटून चापट बनवलेला पदार्थ.
वनस्पति० हिङ्गुपत्री ( ह. र. ३०.५७ ) बाफळी.

**पृथुल**-पु., वनस्पति० दर्भभेदः खरः ( ध. ४.१३२ )
द्र० 'दर्भ' दर्भ.

**( पृथुला )**-स्त्री., वनस्पति० गुण्डासिनी (रा.परि.८.६६)
गुच्छयुक्त मुळांची, गवतासारखी पाने असलेली, पाण्यात होणारी सूज आणि व्रण नाशक वनस्पती.
वनस्पति० हिङ्गुपत्री ( ध. २.३८ ) बाफळी.

**-फल**-न., वनस्पति० राजबदरः ( रा. ११.१६० )
द्र० 'बदर' मोठे बोर. बोराचा प्रकार.

**पृथ्वर्पित**-वि., अवगाढदंष्ट्रापदः दंशः (चचि. २३.१२८)
दंश करताना सुळा खोल गेल्यामुळे झालेला व्रण.

**पृथ्वीका**-स्त्री., वनस्पति० श्यामवर्णः स्थूलजीरकः
( ड. सुक. ६.१८ ) द्र० 'जीरक'
जिऱ्याचा प्रकार. मोठे काळे जिरे.
वनस्पति० हिङ्गुपत्री ( सुक. ५.७३ ) बाफळी.
एला ( सुक. ५.७३ ) वेलची.

**-भट**-पु., रत्न० राजावर्तः ( र. १५.५३-५४ )
राजावर्त रत्न.
वनस्पति० ऋषभकः ( र.१५.५३-५४ ) ऋषभक.
मान० कोलम् ( ह.र. १५.५३-५४ )
कोल प्रमाण= १ तोळा.
धातुविष० मल्लः ( ह.र. १५.५३-५४ ) सोमल.

**पृथ्वीका**-स्त्री., वनस्पति० स्थूलजीरकः, धूमोपयोगि द्रव्यम्
( चसू. ५.२० ) कलौंजी जिरे. जिऱ्याचा प्रकार.
गुणाः-कटुस्तिक्ता कटुपाका उष्णा तीक्ष्णा गन्धाढ्या रुच्या अग्निदीपनी पित्तवर्धनी कफवातघ्नी आध्मानगुल्मामदोषघ्नी च ( ध. २.५९ )
हिं.—कलौंजी.
**म.—कलौंजी जिरें.**
गु.—कलौंजी जीरुं.
बं.—मोटाकेले जीरे.
ता.—चीमैच्चीरकं.
**गुण**-तिखट, कडु, पचनानंतर तिखट, उष्ण, तीक्ष्ण, खूप वास असणारे, रुचकर, अग्निदीपक, पित्तवर्धक, कफवातनाशक, पोटफुगी, गुल्म, आमदोष नाशक.
एला ( चचि. ७.१२२ ) वेलदोडा.
हिङ्गु-पत्री ( सुउ. ४२.९५; ध. २.३८ )
हिंगाचा वास येणारी वनस्पती.
भद्रैला ( असंसू. १४.३; अहसू. १५.४ )
मोठी वेलची, वेलदोडा.

**-तैल**-न., कटुतैल० कृष्णजीरकतैलम्
( सुसू. ४५.११५ ) द्र० 'कटुतैल'
काळ्या जिऱ्याचे तेल.

**पृथ्वीज**-न., लवण० सांभरलवणम् ( रा. ६.४७ )
सांभरलोण.

**पृश्निपर्णी**-स्त्री., वनस्पति० गुणाः- कटुस्तिक्ताम्ला, ( स्वादुः-ध. ) उष्णा, त्रिदोषघ्नी, अतीसारकासवातरोगज्वरोन्मादव्रणदाहरक्तश्वासतृषाहरा
( रा. ४.११७ ) अणुतैलद्रव्येष्वेकम् ( चसू. ५.६५ )
लघुपञ्चमूलेष्वेकम् ( चसू. २:११ ) पित्तश्लेष्मातिसारघ्नपेयायामुपयुज्यते (चसू. २.२०) सांग्राहिकवातहरदीपनीयवृष्याणां श्रेष्ठा ( चसू. २५.४०; असंसू. १३ ) श्वयथुहरगणे एकं द्रव्यम्
( चसू. ४.१६ )
हिं.—पिथिवन.
**म.—पिठवण.**
गु.—पिठवन.
बं.—चाकुलिया.
ता.—पेरू, मल्लिकै.
पिठवण – तिखट, कडु, अम्ल, उष्ण, त्रिदोषनाशक, अतीसार, खोकला, वातरोग, ज्वर, उन्माद, व्रण,

दाह, रक्तविकार, श्वास, तृषा यांना नाहीसे करणारी आहे. अणुतेल करताना आवश्यक द्रव्यापैकी, तसेच लहान पंचमुळे, शोथनाशक गण, कफज व पित्तातिसार नाशक पेज यात उपयोगात आणतात. मळमूत्राचा संग्रह करणाऱ्या वातहारक, दीपक व शुक्रहर द्रव्यात श्रेष्ठ.

**पृषत**–पु., प्राणि० **मृगभेदः, बिन्दुचित्रितहरिणः** ( चक. ४.१२ ) **तस्य मांसरसो जीर्णज्वरे हितः** ( चचि. ३.१९१ )
हरणाचा एक प्रकार, जात. ठिपक्यांनी युक्त हरिण त्याचा मांसरस जीर्णज्वरात हितकर.
**चित्तलः** ( ड. सुक. ५.७१ ) **अयं सविषान्नदर्शनेनाश्रुक्लिन्ननेत्रः संजायते** ( सुक. १.३३ )
चित्तलपक्षी. विषयुक्त अन्न पाहिल्याबरोबर याचे डोळे अश्रूंनी ओले होतात.
**सर्प० मण्डली** ( सुक. ४.३४ (२)
सर्प—घोणस.
**प्राणि० जङ्घालजातीयः** ( ध. परि. ३ )
मांड्या जाड असलेला हरणासारखा प्राणी.

–**पित्त**–(परिव०) न., **चित्रलमृगपित्तम्** ( ड. सुउ. ६१.२४-२५ )
चित्रल नावाच्या हरणाचे पित्त.

**पृषध्र**–पु., राज० **दीर्घसत्रयाजिनानेन पशुभावाद् गवामप्यालम्भः प्रवर्तितः** ( चचि.१९.४ )
पृषध्र नावाचा राजा; दीर्घकालीन यज्ञात इतर पशु न मिळाल्यामुळे याने यज्ञाला गाई घेण्याचा उपक्रम केला.

**पृष्ठ**–न., शारीर० **अन्तराधेः पश्चाद्भागः इदं प्रमाणतोऽष्टादशाङ्गुलोत्सेधम्** ( सुशा. ६.२६; चवि. ८.११७; अहसू. ५.५८ )
पाठ, प्रमाणाने अठरा अंगुळे उंच असावी.

–**गतास्थि**–न., **पृष्ठभागे स्थितमस्थि** ( चशा. ७.६)
पाठीची हाडे.

–**ग्रह**–पु., लक्षण० **पृष्ठं गृह्यते इव वेदना पृष्ठग्रहणवद् वेदनाविशेषः पृष्ठस्य ग्रहः** ( चचि. ११.१३; अहसू., १७.२६ ) पाठ जखडल्याप्रमाणे वेदना.

–**दौर्बल्य**–न., लक्षण० **पृष्ठभागस्य दौर्बल्यम्** ( चचि. १४.१३३ ) पाठ कमजोर असणे.

–**पूरक**–पु., **कुरुक्षेत्रात् पूर्वदेशः** ( काखिल. २५.९ )
पृष्ठपूरक देश, कुरुक्षेत्राच्या पूर्वेकडचा.

–**भङ्ग**–पु., लक्षण० **पृष्ठभङ्गवत्पीडा** ( काखिल. १२.१० )
पाठीचा भाग तुटल्याप्रमाणे पीडा.

–**मर्मन्**–न., **पृष्ठभागस्थं मर्म, चतुर्दशपृष्ठमर्माणि, पृष्ठमर्माणि तु कटीकतरुणकुकुन्दरनितम्बपार्श्वसन्धिबृहत्यंसफलकान्यंसौ चेति** ( सुशा. ६.६ ) द्र० **'मर्म'**
पाठीतील मर्मस्थाने १४, त्यांची नावे वर आहेत.

–**यान**–न., **अश्वोष्ट्रादिपृष्ठारोहणपूर्वकं गमनम्** ( सुचि. ६.२२ )
घोडा, उंट, हत्ती वगैरेंच्या पाठीवर बसून जाणे.

–**वंश**–पु., शारीर० **पृष्ठाधारः** ( सुशा. ६.२६; असंशा. ५.७५; अहसू. १९.२५ ) मणक्यांनी बनलेला पाठीच्या मधला सर, पाठीचा कणा.

–**संग्रह**–पु., लक्षण० **पृष्ठग्रहः** ( चसू. १४.२२ )
पाठ जखडणे.

**पृष्ठायाम**–पु., लक्षण० **पृष्ठबहिर्निर्गतिः** ( चक. चचि. २८.४४ )
पाठीला आचके येणे, पाठ बाहेर येणे.

**पृष्ठारुस्**–न., बालरोग० ( असंउ. २ ) द्र० **'अहिपूतन'**
बालरोगाचा एक प्रकार.

**पृष्ठास्थि**–न., अस्थि० **पृष्ठे स्थितानि अस्थीनि** ( सुशा. ५.१९ ) पाठीतील हाडे.

**पृष्ठेषिका**–स्त्री., शारीर० **पृष्ठवंशः** ( चक. चइ. ३.५ )
पाठीचा कणा.

**पेऊ**–स्त्री., वनस्पति० **गुणाः –कटुकाम्ला, रुचिकृद्बल्यदीपनी च** (रा.परि.७.२१)
पेऊ–वनस्पती. रानआले. **गुण**—तिखट, आंबट रुचिकर, दीपक, बलकर.

**पेटकारी**–स्त्री., वनस्पति० **पिटारी** ( र. २५.९७ ) पिठारी.
**ज्योतिष्मती** ( र. ५.२४१–४२ ) मालकांगोणी.
**क्षुप० कुलिङ्गाक्षी** ( ह. र. १७.६ ) झुडुप.

**पेटारी**–स्त्री., **बलाभेदा पिटारी** ( ह. र. २४.१३३ )
द्र० 'बला' चिकणाप्रकार, पेटारी.

**पेया**–स्त्री., **कृतान्नपेया सिक्थसमन्विता** ( सुसू. ४६.३३४ ) **क्षुत्तृष्णा–ग्लानिदौर्बल्य–कुक्षिरोग–ज्वरनाशिनी, स्वेदाग्निजननी, वातवर्चोऽनुलोमनी च** ( चसू. २७.२५०; चसू. २.१९; चसि. १.११ ) **लघुर्दीपनी बस्तिशोधनी च** ( सुसू. ४६.३४१–३४२ )

पेज. तांदळाची शिते असलेली अगदी पातळ पेज. पेजेचे **गुण**–तहान, भूक, ग्लानि, दौर्बल्य, कुक्षिरोग, ज्वर नाहीसा करणारी, घाम आणि अग्नि उत्पन्न करणारी, वात मळ याची प्रवृत्ति करणारी, हलकी, बस्तिशोधक.

**–मण्ड**–पु. न., पेयाया उपरिस्थितो द्रवभागः ( चचि. ८.१२७ ) पेजेची निवळ.

**पेयादिक्रम**–पु., पेयादिसेवनविधिः, तस्य क्रमः-वमनविरेचनादिशोधनैः शुद्धो नरः सुखाम्बुना स्नातो रक्तशाल्यन्नं भुञ्जानः पेयादिक्रमं भजेत्। तद्यथा–पेयां विलेपीमकृतं कृतं च यूषमन्नकालान् क्रमेण सेवेत। उत्तमशुद्ध्या शुद्धः पेयादिकं त्रीन् त्रीनन्नकालान् भुञ्जीत। मध्यमशुध्द्या शुद्धः द्वौ द्वावन्नकालौ, अवरशुध्द्या शुद्ध एकैकमन्नकालं भुञ्जीत। प्रतिदिनं द्वावन्नकालौ भवत इत्युत्तमशुद्धिशुद्धः सप्तमेऽहनि प्रकृतिभोजनमागच्छेत्। पेयादिक्रमेणाल्पोऽपि जाठराग्निः क्रमेण संधुक्ष्यमाणो महान् स्थिरः सर्वपचश्च भवति ( चसि. १.१०-११; अहृसू. १८.२९-३० )

**पेयादिक्रम**—वमन विरेचन वगैरे पंचकर्मानंतर शरीर शुद्ध झाल्यावर कोमटपाण्याने स्नान करून आहार घ्यावा, त्या क्रमात तांबड्या साळीचा भात घेण्यापूर्वी प्रथम पेया घ्यावी. तीन अन्नाच्या वेळा ती घेऊन पचली म्हणजे नंतर **विलेपी** वगैरे अधिकाधिक दाट पेया, तसेच जिरे, मीठ इ. घालून फोडणी न दिलेली वा दिलेली कढणे अशी अन्नाची सुरुवात करावी, या क्रमास पेयादिक्रम म्हणतात. चांगली शुद्धि झाली तर तीन तीन अन्नकालांच्या अंतराने घट्ट अन्न वाढवावे; मध्यम शुद्धि झाली असेल तर दोन दोन अन्नकालाने व थोडी शुद्धि झाली असेल तर एकेका अन्नकालांनी पेया विलेपी इत्यादी द्याव्या. उत्तम शुद्धीचा मनुष्य सातव्या दिवशी नेहमीच्या आहारावर–भात इत्यादिकांवर येतो. या क्रमामुळे अल्प अग्निसुद्धा क्रमाने वाढून प्रदीप्त होऊन सर्व तऱ्हेचे अन्न पचविण्यास समर्थ होतो.

**पेलव**–वि., अच्छम् ( सुसू. ४५-२०२ )
**अल्पम्** ( सुशा. ५.४० ) थोडे. स्वच्छ.
**सुकुमारम्** ( सुउ. ३९.२९१ ) नाजूक.

**पेशल**–वि., कोमलमकठिनम् (सुचि.३३.६;अहृसू.२.२६) नाजूक, सुकुमार, कोमल, मृदु.

**–वाच्**–वि., प्रियंवदः ( इन्दु. असंउ. ४९ ) मनपसंत बोलणे, सुखकर बोलणे.

**पेशिक**–न., खण्डः ( असंचि. ९ ) तुकडा, भाग.

**पेशी**–स्त्री., शारीर० पञ्च पेशीशतानि भवन्ति। तासां चत्वारि शतानि शाखासु, कोष्ठे षट्षष्टिः ग्रीवां प्रत्यूर्ध्वं चतुस्त्रिंशत्, एकैकस्यां तु पादाङ्गुल्यां तिस्रस्तिस्रस्ताः पञ्चदश, दश प्रपदे, पादोपरि कूर्चसन्निविष्टास्तावत्य एव, दश गुल्फतलयोर्गुल्फजान्वन्तरे विंशतिः, पञ्च जानुनि, विंशतिरूरौ, दश वङ्क्षणे, शतमेवमेकस्मिन् सक्थ्नि भवन्ति। एतेनेतरसक्थि बाहू च व्याख्यातौ, तिस्रः पायौ, एका मेढ्रे, सेवन्यां चापरा, द्वे वृषणयोः स्फिचोः पञ्च पञ्च, द्वे बस्तिशिरसि, पञ्चोदरे, नाभ्यामेका, पृष्ठोर्ध्वसन्निविष्टाः पञ्च पञ्च दीर्घाः, षट् पार्श्वयोः दश वक्षसि, अक्षकांसौ प्रति समन्तात् सप्त, द्वे हृदयाऽऽमाशययोः, षट् यकृत्प्लीहोण्डु-(न्दु)केषु, ग्रीवायां चतस्रः अष्टौ हन्वोरेकैका काकलकगलयोः द्वे तालुन्येका जिह्वायां, द्वे ओष्ठयोर्द्वे नासायां, द्वे नेत्रयोर्गण्डयोश्चतस्रः कर्णयोर्द्वे, चतस्रो ललाटे, एका शिरसीत्येवमेतानि पञ्च पेशीशतानि। भवति चात्र–" सिरास्नाय्वस्थिपर्वाणि सन्धयश्च शरीरिणाम्। पेशीभिः संवृतान्यत्र बलवन्ति भवन्त्यतः"। स्त्रीणां तु विंशतिरधिका, दश तासां स्तनयोरेकैकस्मिन् पञ्च–पञ्चेति, यौवने तासां परिवृद्धिः अपत्यपथे चतस्रः, तासां प्रसृते अभ्यन्तरतो द्वे, मुखाश्रिते बाह्ये च वृत्ते द्वे, गर्भच्छिद्रसंश्रितास्तिस्रः शुक्रार्तवप्रवेशिन्यस्तिस्र एव, पित्तपक्वाशययोर्मध्ये गर्भशय्या, यत्र गर्भस्तिष्ठति। तासां बहलपेलवस्थूलाणुपृथुवृत्तह्रस्वदीर्घस्थिरमृदुश्लक्ष्णकर्कशभावाः संध्यस्थिसिरास्नायुप्रच्छादका यथाप्रदेशं स्वभावत एव भवन्ति (सुशा.५.३७-४०) चत्वारि पेशीशतानि ( चशा .७.१४ )

पेशी– या पेशी पांचशे आहेत. स्त्रीशरीरामध्ये वीस अधिक आहेत. शरीरातील सिरा, स्नायु, अस्थिपर्वे आणि सांधे हे पेशींनी आच्छादित असल्यामुळे शरीर बलवान झाले आहे. चारशे पेशी शाखेत, कोठ्यात सहासष्ट, मान व वर चौतीस. एकेक पायाच्या अंगुळीत तीन तीन अशा १५, बाकीच्या पायात तळात दहा व वर दहा, घोटा व तळ यात दहा, घोटा व गुडघा यात वीस, पाच गुडघ्यात, मांडीत वीस,

जांघेत दहा अशा एक टांगेत १००. अशाच दुसऱ्या टांगेत व हातात. तीन गुदात, एक शिश्नात, शिवणीत एक, वृषणात दोन, ढुंगणात पाच पाच, बस्तीच्या डोक्यात दोन, उदरात पाच, नाभीत एक, पाठीच्या वरच्या भागात लांब पाच पाच. फासळ्यात सहा, छातीत दहा, अंसफलक गळसरीच्या भोवती सात, आमाशय व हृदय यात दोन, सहा यकृत प्लीहा व उंडुक यात, मानेत चार, हनुवटीत आठ, काकलक व गळा यात दोन, टाळूत दोन, जिव्हेत एक, दोन ओठात, दोन डोळ्यात, गालात चार, कानात दोन, चार कपाळात, एक डोक्यात, अशा पाचशे. स्त्रियांच्या स्तनात पाच पाच अशा दहा. तारुण्यात या वाढतात, योनीत चार, आत दोन, तोंडात व बाहेर दोन ( वाटोळ्या ) गर्भाशय छिद्राश्रित तीन, शुक्र व आर्तव प्रवेशिनी तीन. पित्त व पक्वाशय यामध्ये गर्भाची शय्या असते; तेथे गर्भ असतो. त्या पुष्कळ, नाजुक, जाड, सूक्ष्म, पसरट, वाटोळ्या, लांब, आखूड, स्थिर, मऊ, गुळगुळीत, खरखरीत अशा असतात, त्या संधि, हाडे, शिरा, स्नायु याना झाकतात.

**वनस्पति० मांसी** ( ध. ३.४५ ) जटामांसी.

**पेषण**–न., **घर्षणम्** ( र. २.५० ) वाटणे, घासणे.

**(पेषणी)** स्त्री., **यंत्र० चूर्णनार्थं खल्वे द्रव्यविशेषं न्यस्य यया तस्य कुट्टनं क्रियते** ( र. ७.५-८ )
बत्ता, खलण्याचा–कुटण्याचा बत्ता.

**पैङ्गल्य**–न., **लक्षण० पिङ्गाक्षता नेत्रयोः पिङ्गलवर्णः** ( सुशा. ४.८३ )
डोळे पिंगट असणे, डोळ्यांचा पिंगटपणा.

**पैङ्गल्याबाध**–पु., **रोग० पैङ्गल्यम् पिङ्गलनेत्रता** ( चशा. ८.३२ ) रोगविशेष, डोळ्याचा पिंगटपणा.

**पैङ्गि**–पु., **ऋषि० रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः** ( चसू. १.१२ )
पैंगीऋषि, रोगनाशक उपचाराबद्दल विचारविनिमयाकरिता हिमालयाच्या उतरणीवर जमलेल्या ऋषींपैकी एक.

**पैच्छिल्य**–न., **लक्षण० अतिचिक्कणता पिच्छिलभावः** ( सुसू. ११.१७ ) अतिचिकटपणा. बुळबुळीतपणा.

**पैत्त**–वि., **पित्तप्रकृतिकः** (ड. सुक. ५.३८) पित्तप्रकृतीचा.
वि., **पित्तलः पित्तजनकः** ( सुक. ५.३८ )
पित्त उत्पन्न करणारा.

**पैत्तिक**–वि., **पित्तप्रकृतिः** ( सुशा. ४.७१ )
पित्तप्रकृतीचा–स्वभावाचा.

**पैत्र्य**–वि., **पितृसम्बंधि(कार्यम्)** ( सुसू. २९.१७–१८ )
पितराचे काम ( कार्य ).

**पैशाच**–न., **राजससत्त्वस्यैकः प्रकारः। तल्लक्षणम्–महाशनः स्त्रैणः स्त्रीरहस्कामोऽशुचिः शुचिद्वेषी भीरुर्भीषयिता विकृतविहाराहारशीलश्च** ( चशा. ४.३८(३) )
पिशाच्च वृत्तीचा एक प्रकार. **लक्षण**–खूप खाणारा, विषयासक्त, अपवित्र, पावित्र्याचा द्वेषी, भित्रा, दुसऱ्यास भिवविणारा, विकृत आहार-विहारशील, स्त्रियांशी एकांतात राहू इच्छिणारा.

**–काय**–(परिव०) पु., **राजसकाय०** ( सुशा. ४.९३ )
**पैशाच** राजस प्रकृतीचा मनुष्य. **पैशाचस्वभावः** ( सुशा. ४.९२–९३ ) पिशाच्च स्वभाव.

**पैशुन्य**–न., **दोषमात्रसूचकता दौर्जन्यमिति** ( सुचि. २४.९० ) **परस्याप्रत्यक्षं तद्दोषकीर्तनम्** ( अहृसू. २.२१ )
दुसऱ्याचे दोष किंवा चुका दाखविणे. समक्ष नसता दुसऱ्याचे दोष बोलणे.

**पैष्टिक**–वि., **तण्डुलपिष्टकृतः (भक्ष्यः)** ड. **गुणाः–उष्णः कफपित्तप्रकोपणः, विदाही** ( सुसू. ४६.४०१ )
पिठापासून केलेला पदार्थ. उष्ण कफपित्तप्रकोपक घशाशी जळजळ करणारा.
वि., **यवगोधूमादिपिष्टकृतं ( मद्यम् )** ( अहृसू. १३.२ )
जव गहू इत्यादि पिठांचे केलेले मद्य.
वि., **पिष्टसंस्कृतं पिष्टमयं वा ( अन्नम् )** ( चसू. २३.४ ) पीठ लावलेले किंवा पिठाचे अन्न.

**पोगर**–न., **अलकवत्कुटिलरेखाः, तरङ्गसदृशरेखाः** ( र. ५.८१ )
पोगर जातीचे लोह ज्यात कुरळ्या केसासारख्या वाकड्या रेषा, तरंगासारख्या रेषा आहेत ते.

**पोटगल**–पु., **वनस्पति० होग्गलः** ( चक्र.चसि. १०.३३ )
पोटगल, देवनळ, काशगवत.
**नलः** ( का. बालग्रह चि. ) ( ध. ४. ४१ ) नळ.
**वैकरञ्जेभ्यस्त्रिभ्यो जातः सर्पविशेषः, अयं राजिलेन गोनस्यां वैपरीत्येन वा जातो मातृसमोल्बणविषः मण्डलिसर्पविशेषसदृशो वर्तते** ( सुक. ४.३४(५) )

सर्पाचा प्रकार. वैकरंजापासून तिघांपासून झालेला सर्पप्रकार. घणसासारखा सर्प. मादीसारखा विषारी.

**पोटबन्ध**–पु., पारदबन्ध० **द्रुतकज्जलीमोचापत्रके चिपिटीकृतः स पोटः** ( र. ११.७३ )
पाऱ्याचा एक बंध. पातळ कज्जली केळीचे पानावर थापून केलेला.

**पोटलिका**–स्त्री., प्रसेविका ( इन्दु. अस.२. १ ) पुरचुंडी.

**पोटली**–स्त्री., पोटलिका ( र. १४.२८ )
पोटली, परचुंडी, पुरचुंडी.

**पोटा**–स्त्री., वनस्पति० **इक्षुगन्धा** ( चक्र. चक. १.२५ )
सराटा, भुईकोहळा.

**पोट्टल**–पु., पोटली ( चचि. ७.५१ ) पुरचुंडी.

**( पोट्टली )**–स्त्री., कल्पः **पोट्टलीरसादिः** ( र. १६.१३७ )
पुटलीच्या आकाराची केलेली मात्रा. हेमगर्भपुटळी, पोट्टली मात्रा.

**पोट्टलिका**–स्त्री., पोटली ( चशा. ८.४७ ) पुरचुंडी.

**पोट्टली**–स्त्री., ( र. १६.१३७ ) पुरचुंडी.

**पोत**–पु., **वस्त्रम्** ( र. १३.१३-१२ ) वस्त्र.

**–शालि**–पु., वनस्पति० **सूक्ष्मशालिः** ( रा. १६.९२ )
द्र० **'शालि'** बारीक भात. शालीविशेष.

**पोतका**–स्त्री., वनस्पति० **पोतकी** ( ध. परि. ४.५ )
पोतकी.

**पोतकी**–स्त्री., वनस्पति० **गुणाः–शीतला, स्निग्धा, श्लेष्मला, वातपित्तघ्नी च** ( ध. परि. ४.५ )
पोतकी नावाची थंड, स्निग्ध, वातपित्तनाशक; कफवर्धक वनस्पती.

**पोताश्रय**–पु., **कर्पूर०** ( र. १२.७६-८८ ) कापूर.

**पोतिका**–स्त्री., वनस्पति० **मूलपोती** ( रा. परि. ७.७८ )
पोतकी.
**शतपुष्पा** ( रा. ४.१ ) बडीशेप.

**पोथकी**–स्त्री., नेत्ररोग० **कफात् नेत्रवर्त्मनि सर्षपाभा घनाः श्वेताः शोफोपदेहरुक्कण्डूपिच्छिलाश्रुसमन्विताः पिटिका भवन्ति** (असंउ. ११; सुउ. ३.११)
**पोथकीं शस्त्रेणावलिखेत्** ( सुउ. १३.१४-१५ )
पोथकी. रांजणवाडी, आंजुर्ली. डोळ्याच्या पापणीत मोहरीसारख्या घट्ट पांढऱ्या, सूज वेदना खाज बुळबुळीत अश्रु व मळयुक्त पुळ्या होतात. हा विकार शस्त्राने खरडून काढावा लागतो.

**पोत्थकी**–स्त्री., नेत्रवर्त्मरोग० **पोथकी** ( असंउ. २ )
रांजणवाडी, आंजुर्ली.

**पौंश्चल्य**–न., **पुंश्चल्याः स्वैरिण्या भावः पौंश्चल्यम् व्यभिचारः** ( कासू. २८ ) व्यभिचार, छिनालकी.

**पौण्डरीक**–पु., बालग्रह० ( काइ. १६.१७ )
पौण्डरीक, एक बालग्रह.

**पौण्डर्य**–न., वनस्पति० **प्रपौण्डरीकम्** ( रा. १२.१५४ )
प्रपौण्डरीकम्–वेल आहे, पांढरे कमळ.

**पौण्ड्रक**–पु., **इक्षुभेदः** ( चसू. २७.२३८ )
**गुणाः–मधुरः शीतः स्निग्धो बृंहणः श्लेष्मलः सरोऽविदाही गुरुर्वृष्यः** ( सुसू. ४५.१५१; ध. ४.१२०; सुचि. २६.१७ ) उसाचा प्रकार.
**गुण**—गोड, थंड स्निग्ध, पौष्टिक, सारक, जळजळ न करणारा, जड, शुक्राला हितकर, कफवर्धक.

**पौण्ड्रवर्धनक**–न., देश० **कुरुक्षेत्रात् पूर्वदेशः** ( काखिल. २५.८ )
देशाचे नाव, कुरुक्षेत्राच्या पूर्वेचा देश.

**पातन**–पु., बालरोग० **पूतनाग्रहजनितो बालरोगः मातृकादोषो वा** ( असंउ. २ )
पूतनाग्रहापासून निर्माण झालेला बालरोग.
देश० **मथुराप्रदेशः अयं महाशननिर्विषादिगुणवज्जलौकानां प्रभवभूमिः** ( सुसू. १३.१३ )
एक देश; मथुरा. पुष्कळ खाणाऱ्या, निर्विष वगैरे गुणयुक्त जळवांच्या उत्पत्तीचा प्रदेश.

**पौतीक**–न., वनस्पति० **पूतिकरञ्जः** ( काखिल. १६.३९–४० ) सागरगोटा.

**पौत्तिक**–न., **पुत्तिकाः पिङ्गला महत्यो मक्षिकाः, तद्भवं पौत्तिकं मधु, मधुभेदः एतद् घृतवर्णम्,** (चसू. २७.२४३; सुसू. ४५.१३३-३४; असंसू. ६.९८ ) मधाचा प्रकार. पुत्तिका माशीचे ( पांढरे ) मध.

**पौत्रजीविक**–न., अलङ्कार० **ग्रीवायां कण्ठे वा धारणार्थं पुत्रजीवकाष्ठकृतरुचकादि आभरणम्** ( सुउ. ३१.८ )
गळयात घालण्याचा पुत्रजीवाच्या लाकडाचा एक दागिना.

**पौपिक**–पु., **पूपादिभक्ष्याणां साधकः कन्दूक इत्यर्थः, महानसे नियुक्तेषु परिचारकेष्वेकः** ( सुक. १.१७-१८ )
पोळ्या भाकरी इ० भाजण्यासाठी केलेली शेगडी. मुदपाकखान्यावर (स्वयंपाकगृहावर) नेमलेल्या नोकरांपैकी किंवा भाकऱ्या पोळ्या भाजणारा नोकर.

**पौर**–न., भैषज्य० **बोलम्** ( ध. ३.६२ ) बोळ.

वनस्पति० कतृणम् ( ध. १.८० )
कतृण, रोहिसगवत.

**-जनपद्**-पु., पुरी जनपदे वा कृतावस्थितिकः नागरिको जानपदश्चेत्यर्थः ( चवि. ३.२० )
शहरात गांवात रहाणारे नागरीक.

**पौरुष**-न., शारीर धातु० शुक्रम् ( चवि. ३०.१३३ )
शुक्र, वीर्य, धातु.
पुरुषकृतं कर्म, प्रयत्नः ( चशा. २.४४ )
प्रयत्न. पुरुषाने केलेले कर्म.
शारीरं बलम् ( चसू. ११.३ ) शरिराची शक्ति.
मेढ्रम् ( ड. सुनि. ३.१९ )
शिश्न, पुरुषाचे जननेंद्रिय.

**पौरुषादिनी**-स्त्री., रेवतीग्रह० यस्या अपत्यं षोडशाब्दतः प्राक् म्रियते, सा जातहारिणि साऽसाध्या ( का. रेवति. क. ५२ )
रेवती ग्रहाने होणारा त्रास. बालकाला सोळा वर्षांच्या आत जो मारतो तो. रेवतीग्रह. हा असाध्य आहे.

**पौरुषार्थिन्**-वि., शुक्रार्थी ( चचि. २ (२).३२)
वीर्यवृद्धीची इच्छा करणारा.

**पौरुषेया**-वि., पुरुषोपलक्षितशुक्रवृद्धये हिता वृष्या ( सुसू. ४५.२३) शुक्रवृद्धीला उपयोगी.

**पौरुषोपचय**-पु., शुक्रोपचयः ( चसू. १३.१६ )
शुक्रधातूची वाढ.

**पौरोगवर्ग**-पु., सूदशास्त्राभिज्ञः ( चचि. २४.१९ )
पाकशास्त्री.

**पौर्वभक्तिक**-वि., भोजनात्प्राक् प्रयोजितम् ( चचि. १४.६५ ) जेवणापूर्वी दिलेले.

**(पौर्वभक्तिकी)**-वि. भोजनात्प्राक् योजिता ( चचि.१४.६५ ) भोजनापूर्वी योजलेले.

**पौर्वाह्णिक**-वि., पूर्वाह्णे भव उपयुज्यमानो वा इति ( चचि. १.(२).७ )
पूर्वेकडील. सकाळी होणारे किंवा उपयोगात आणलेले.

**पौष्कर**-न., वनस्पति० पुष्करमूलम् ( ध. १.६६; सुउ. ४२.६९ ) पुष्करमूळ.
शाक० इदं तु कषायमीषद्विष्टम्भि रक्तपित्तहरं च बीजमस्य रसपाकयोर्मधुरम् ( चसू. २७.११९ )
विशेष प्रकारची भाजी. ही तुरट, थोडी अवष्टंभक, रक्तपित्तहारक. हिचे बी रसाने व पचल्यावर गोड.
कमलबीजम् ( सुसू. ४६.१७३ ) कमळाचे बी.



**पौष्कलावत**-पु., धन्वन्तरिशिष्येष्वेकः ( सुसू. १.३ )
धन्वन्तरीचे एक शिष्य.
वि., पौष्कलावतकृतं ( तन्त्रम् ) ( सुसू. ४.९ )
पौष्कलावताने केलेला ग्रंथ.

**पौष्टिक**-वि., संरक्षकं, पुष्टिदायकम्, पुष्टिः रक्षा वृद्धिर्वा प्रयोजनमस्येति ( चवि. ८.१४ ) पुष्टिदायक.

**पौष्पाञ्जन**-(परिव०) न., पुष्पाञ्जनम् (चचि. २६.२५०)
जस्ताच्या फुलाचे अंजन.

**पौष्पिक**-न., खनिज० पुष्पाञ्जनम् ( ध. ३.१६२ )
जस्ताच्या फुलाचे अंजन.

**प्रकटकोष्ठी**-स्त्री., यन्त्र० अपावृताऽऽननं कोष्ठीयन्त्रम् ( र.८.७८ ) कोष्ठीयन्त्र, तोंड न झाकलेली कोठी, उघडी भट्टी.

**प्रकटमूषा**-स्त्री. शरावाऽऽकारसंयुता मूषा, वृन्ताकमूषा (र. २.८९) मूस, शरावाच्या आकाराची, वांग्याच्या आकाराची मूस.

**प्रकम्पमान**-वि., प्रसारणे कम्पमानम् काण्डभग्नम् ( सुनि. १५.१० ) ताणले असता थरथरणारे फुटलेले लांब हाड.

**प्रकरण**-न., विषयः ( चवि. ८.६८ ) विषय.

**-सम**-पु., तंत्रयुक्ति० यस्मात् प्रकरणचिन्ता स निर्णयार्थमपदिष्टः प्रकरणसमः, पक्ष एव हेतुर्भवति यत्र सः ( चवि. ८.५७ ) निर्णयार्थं प्रयुक्तो हेतुर्यत्र निर्णयं जनयितुमशक्तस्तुल्यबलेन परेण प्रतिबन्धात् किन्तु धर्मिणः साध्यवत्त्वं तदभाववत्त्वं वेति जिज्ञासां प्रवर्तयति स प्रकरणसमः (गौ. वृ. १।२।७) तत्र प्रकरणसमो नामाहेतुर्यथा-अन्यः शरीरादात्मा, तस्मान्नित्यः; शरीरं स नित्यमतो विधर्मिणा चात्मना भवितव्यमित्येष चाहेतुः; नहि य एव पक्षः स एव हेतुरिति । द्र० 'तन्त्रयुक्ति'
प्रकरणसमनामक अहेतु म्हणजे दुष्टहेतु असा— " शरिराहून अन्य असलेला आत्मा नित्य होय " असा पक्ष मांडला असता त्यावर प्रतिवादी म्हणेल की " ज्यापेक्षा शरिराहून आत्मा अन्य आहे, त्यापेक्षा नित्य आहे; ( म्हणजे ) ज्यापेक्षा शरीर अनित्य आहे, त्यापेक्षा आत्मा विधर्मी ( शरिराशी विधर्मी=विरुद्धधर्मी=नित्य ) असणारच; हाच अहेतु होय; कारण जो पक्ष तोच हेतु असत नाही. " तात्पर्य, शरिराहून आत्मा भिन्न आहे हे सिद्ध न करताच त्याचा हेतु म्हणून उपयोग करणे अयोग्य होय. आत्मा नित्य आहे हे जसे सिद्ध

व्हावयाचे आहे तसेच आत्मा शरिराहून भिन्न आहे हेही सिद्ध व्हावयाचे आहे. जे सिद्ध नाही परंतु सिद्ध करणे आवश्यक तो 'पक्ष'; असा येथे 'पक्ष' शब्दाचा अर्थ आहे. )

साध्याच्या निश्चयार्थ प्रयुक्त असलेला जो हेतु निश्चय निर्माण करण्यास असमर्थ ठरतो तो ( प्रकरण-सम. ) कारण त्याच्याशी तुल्यबल विरुद्ध हेतु त्या निश्चयाला प्रतिबंध करतो; परंतु त्या प्रकरणाच्या हेतू-मुळे धर्मी ( जो पक्ष ) साध्यवान् आहे की साध्या-भाववान् आहे असा संशय येऊन जिज्ञासा प्रवृत्त होते, त्या प्रकारचा हेतु प्रकरणसम (सत्प्रतिपक्ष) होय.

**प्रकामतस्**–अव्य., स्वेच्छया ( ड. सुउ. ५५.३३ ) स्वताच्या इच्छेने.

**प्रकाश**–वि., सदृशम् ( सुनि. २.१२ ) तेज.
प्रकटः अनावृतः ( सुशा. ५.४९ ) स्पष्ट न झालेला.
पु., आलोकः ( अहृसू. ९.८ ) उजेड.
न., कृत्रिमधातु० कांस्यम् ( ध. ६.२३ ) कासे.

**–क्षमता**–स्त्री., प्रभा भास्वरादिरूपसहत्वम् ( अहृसू. २४.११ ) तेज सहन करण्याची योग्यता –सामर्थ्य. तीव्र प्रकाश सहन करणे.

**प्रकाशन**–न., अभिव्यक्तिः, आग्नेयद्रव्यस्य कार्यम् ( सुसू. ४१.४(३) )
चकचकणे, आग्नेय द्रव्याचे कार्य.
ज्ञापनम् ( चवि. ८.४२ )
व्यक्त करणे, ज्ञान करणे, समजावणे.

**प्रकीर्य**–पु., वनस्पति० उदकीर्यः ( रा. ९.१८० )
उदकीर्य. एक करंज ( प्रकार ).
रीठाकरञ्जः ( रा. ९.१८७ ) करंजप्रकार, रीठा.
करञ्जः ( ध. ५.१०७ ) करंज.
कण्टकीकरञ्जः ( सुउ. ११.९; अहृसू. १५.१९ )
द्र० 'करञ्ज' काटेरी करंजप्रकार.

**( प्रकीर्या )**–स्त्री., वनस्पति० करञ्जः
( चक्र.चसि.१०.२६ ) कण्टकी विटपकरञ्जः
( सुसू. ३९.९; असंसू. १६.१३ )
विटपकरंज. एक करंजप्रकार.

**प्रकीर्यक**–पु., वनस्पति० करञ्जः ( रा. ९.१७६ ) करंज.

**प्रकुञ्च**–पु., मान० पलम् ( चक्र. चचि. २८.१२४; सुचि. ३७.१०२; असंक. ८; अहृसू. १९.१८; र. १२.१२१-२२ ) चार तोळे.

**प्रकुथित**–न., प्रकोथः, पूतिभावः (सुचि.२३.५) कुजलेले.

**प्रकुपित**–वि., विकृतम् (चशा. ६.१७) विकृत. बिघडलेले.

**प्रकृति**–स्त्री., स्वभावः (चवि. ८.९५) दोषकृतः शरीर-स्वभावः, तद्यथा–शुक्रार्तवस्थैर्दोषैर्गर्भस्याऽऽदौ जन्म भवति, तथा च तैस्तिस्रः प्रकृतयो भवन्ति। वातप्रकृतिः, पित्तप्रकृतिः, कफप्रकृतिरिति, तासु वातप्रकृतिर्हीना, पित्तप्रकृतिर्मध्या, कफप्रकृतिश्चो-त्तमा भवति। द्विदोषजाः प्रकृतयो निन्द्या समधा-तुप्रकृतिः सर्वासु श्रेष्ठा भवति ( अहृसू. १.९-१० ) शुक्रशोणितप्रकृतीं, कालगर्भाशयप्रकृतिमातुराहार-विहारप्रकृतिं, महाभूतविकारप्रकृतिं च गर्भशरीर-मपेक्षते। एतानि हि येन येन दोषेणाऽधिकेनै-केनाऽनेकेन वा समनुबध्यन्ते, तेन तेन दोषेण गर्भोऽनुबध्यते, ततः सा सा दोषप्रकृतिरुच्यते मनुष्याणां गर्भादिप्रवृत्ता, तस्मात् श्लेष्मलाः प्रकृत्या केचित् पित्तलाः केचित्, वातलाः केचित्, संसृष्टाः केचित्, समधातवः केचिद्भवन्ति ( चवि. ८.९५ ) शुक्रशोणितसंयोगे यो दोष उत्कटो भवेत्, तेन प्रकृतिर्जायते ( सुशा. ४.६३ ) विषजातः कीटो यथा विषेण न विपद्यते तथा प्रकृतयो मर्त्यं बाधितुं न शक्नुवन्ति, ( सुशा. ४.७९ ) प्रकोपोऽन्यथा-भावः क्षयो वा प्रकृतीनां स्वभावेन नोपजायते, गतायुषस्त्वन्यभावो जायते ( सुशा. ४.७८ ) प्रकृतिरोगयोश्चायं विशेषः–प्रकृतिरपथ्योपसेवया नात्यन्तं बाधते ( मा. पञ्चनिदान मधुकोशः ) तथा पुनः सप्तप्रकृतयो जातिकुलदेशकालवयोबल-प्रत्यात्मसंश्रयाः ( असंशा. ८.२२ ) दोषवच्च गुणै-रपि सत्वादिभिः सप्त प्रकृतयो भवन्ति। तास्तद्-भिनिवृत्तैरेव यथोक्तैः शौचादिभिर्जानीयात् (असंशा. ८.२१) केषांचिन्मते भौतिक्यपि प्रकृति-र्भवति। एवं पञ्चमहाभूतैः पञ्चमहाभूतप्रकृतयो भवन्ति। तत्र पवनभूतप्रकृतेर्वातप्रकृतावन्तर्भावः, दहनभूतप्रकृतेः पित्तप्रकृतौ, तोयप्रकृतेः कफप्रकृ-तावववरोधो नाम अन्तर्भावः कृतः, पार्थिवप्रकृतिः स्थिरविपुलशरीरः क्षमावांश्च भवति। नाभस-प्रकृतिश्च महद्भिः खैर्युक्तः शुचिश्चिरजीवी च भवति ( सुशा. ४.८० ) आरोग्यम्–यतः प्रकृतिश्चारोग्यम् ( चवि. ६.१३ )

प्रकृति म्हणजे स्वभाव, आरोग्य; शुक्र व आर्तव यांचा संयोग गर्भाशयामध्ये झाल्यावर त्यामध्ये जो

दोष ( वात, पित्त, कफ ) अधिक असेल ती प्रकृति म्हणजे स्वभाव किंवा शरीरधर्म त्या प्राण्याचे होतात, यास प्रकृति म्हणतात. चरकाचार्य हिला दोषप्रकृति म्हणतात. यांच्यापैकी वातप्रकृति ही कनिष्ठ, पित्त-प्रकृति मध्यम आणि कफप्रकृति उत्तम व सर्व दोष ज्यामध्ये सम आहेत ती श्रेष्ठ आहे. शुक्रशोणित यांतील दोषांनी होणारी, कालगर्भाशयस्थ दोषजन्य, आईच्या आहारविहारांनी होणारी, महाभूतांच्या विकारांनी होणारी प्रकृति गर्भशरीराची असते, ती पृथक पृथक पहावी. या ज्या ज्या एक किंवा अनेक दोषांच्या आधिक्याने ती बनते तिचा गर्भशरिराशी संबंध राहातो ती ती गर्भावस्थेपासून निर्माण झालेली दोषप्रकृति म्हटली जाते. म्हणून काही वातल, काही पित्तल, काही कफज, काही द्वंद्वजदोषांची व काही समधातु होतात. विषात झालेल्या किड्याला जसे विष मारक होत नाही तशी प्रकृति मनुष्याला घातक—अतिबाधक होत नाही. प्रकृतींचा ( प्रकृतिकर दोषांचा ) प्रकोप क्षय किंवा अन्य प्रकृति बनणे स्वभावतः होत नाही. गतायुषी असेल तर ही स्वभावतः होतात. जाति कुल देश काल वय बल व स्वतः प्रमाणे अशा सात प्रकृति असतात. दोषां-प्रमाणे सत्वादी गुणांप्रमाणेही प्रकृति होतात. त्या शुचित्व आस्तिकता इत्यादींनी समजाव्या. काहींच्या मताने पंचमहाभूतांचीही प्रकृति असते. वायूची वात, अग्नीची पित्त व जलाची प्रकृति कफप्रकृतीत समाविष्ट होते. पार्थिव प्रकृतीचे लोक शरीराने स्थिर धिप्पाड व क्षमावान असतात. आकाशीय लोकांच्या शरिराची रंध्रे प्रकृतीने मोठी असतात आणि ती व्यक्ति पवित्र व दीर्घजीवी असते.

**चतुर्विंशतितत्त्वेष्वेकम्—सर्वभूतानां कारणं सत्त्वरजस्तमोलक्षणमष्टरूपमखिलस्य जगतः संभवहेतुरव्यक्तं नाम । तदेव प्रकृतिरित्युच्यते सांख्यदर्शने । एका प्रकृतिर्बहूनां क्षेत्रज्ञानामधिष्ठानं समुद्र इवौदकानां भावानाम्** ( सुशा. १.३ ) **प्रकृतिः अनादिरनन्ता नित्या सर्वगता च, तथैवैकाऽचेतना त्रिगुणात्मका बीजधर्मिणी प्रसवधर्मिणी अमध्यस्थधर्मिणी च** ( सुशा. १.९ ) **यदा सत्वरजस्तमसां साम्यावस्था तदा न सर्गः, यदा तु सत्वादिगुणानां वैषम्यं भवति तदा सर्गः। तद्यथा—प्रकृतेर्बुद्धिस्ततोऽहङ्कारात्सात्विकादेकादशेन्द्रियाणि तामसाच्च पञ्चतन्मात्राणि तन्मात्रेभ्यः पञ्चमहाभूतान्याकाशादीन्युत्पद्यन्ते** ( चशा. १.६६ ) **सांख्ये मूलप्रकृतिर्बुद्धिरहङ्कारः पञ्चतन्मात्राणीत्यष्टतत्त्वानां समुदायोऽष्टधातुकी प्रकृतिरित्युच्यते** ( चशा. १.१७ ) **वैद्यके तु " स्वभावमीश्वरं कालं यदृच्छां नियतिं तथा । परिणामं च मन्यन्ते प्रकृतिं पृथुदर्शिनः "। इति षट् प्रकृतयः उक्ताः** ( सुशा. १.११ )

चौवीस तत्वांपैकी एक.

सत्व, रज, तम या गुणांची आठ प्रकारची व सर्व जगाच्या उत्पत्तीचे कारण असलेली प्रकृती अव्यक्त या नावानेही संबोधिली जाते. समुद्र हा जसा सर्व जलाशयांचा अधिष्ठान आहे तशी प्रकृती ही सर्व जीवांची अधिष्ठान आहे. सांख्यदर्शनात अव्यक्ता-लाच प्रकृती म्हटले आहे. प्रकृतीचे स्वरूप पुढील-प्रमाणे सांगितले आहे. प्रकृति ही अनादि आहे. अनन्ता, नित्या, सर्वगता, त्रिगुणात्मिका आहे. जेव्हा सत्व रज व तम यांची साम्यावस्था असते तेव्हा उत्पत्ति नसते, पण त्यात जेव्हा वैषम्य होते, तेव्हा ती होते. ती अशी — प्रकृतीपासून बुद्धि, अहंकार. सात्विक अहंकारापासून अकरा इंद्रिये, तामस अहं-कारापासून तन्मात्रा, तन्मात्रांपासून आकाश इत्यादि पाच महाभूते होतात. महदादितत्त्वांची बीजे हिच्यात आहेत. म्हणून बीजधर्मिणी. परमात्म्याच्या संयोगाने महदादींना जन्म देते म्हणून प्रसव-धर्मिणी आणि सुखाची अभिलाषा दुःखाचा द्वेष करणारी ती अबीजधर्मिणी होय.

सांख्यात—मूळ प्रकृति, बुद्धि, अहंकार, पंच तन्मात्रा ह्या आठ तत्वांच्या समुच्चयाने अष्ट धातूंची प्रकृति म्हटली जाते. वैद्यकात स्वभाव, ईश्वर, काल, यदृच्छा, नियति, परिणाम या सहा प्रकृति सांगितल्या आहेत.

**वातादिदोषाणां, रसादिधातूनां च साम्यावस्था** ( चसू. ५.४ )
त्रिदोष आणि सप्त धातू यांची समस्थिति.

**आत्मा** ( चशा. ३.२५ ) आत्मा.

**धातुसाम्यम्** ( चसू. ९.४ ) सर्व धातु सम असणे.

**स्वभावः** ( चचि. ३.१२ ) स्वभाव.

**सांख्यतत्त्व० अव्यक्तम्** ( चशा. १.१७ ) अव्यक्त.

**प्राकृतस्थितिः** ( चशा. ४.१४ ) नैसर्गिक स्थिति.

**स्वाभाविकः प्राणिनो निजो धर्मः** ( सुसू. ३०.३ ) प्राण्यांचा स्वभावधर्म.

स्वरूपम् ( इन्दुः. असंनि. ४.१७ ) स्वरूप.

**–कल्पवित्**–वि. **द्रव्यस्य स्वभावं संस्कारञ्च जानानः** ( चचि. ४.३२ )
निरनिराळ्या वस्तूंचा स्वभाव जाणणारा प्रकृतीचा जाणकार.

**–गत**–वि., **प्राकृतावस्थां प्राप्तः** ( चसि. १२.९ )
निरोगी अवस्थेत पोचलेला.

**–गन्ध**–पु., **स्वाभाविकगन्धः** ( सुसू. २८.९-१० )
नैसर्गिक वास.

**–गुरु**–वि., **स्वभावतः गुरुगुणोपेतं द्रव्यम्** (चसू.५.५)
स्वभावतः जडगुणयुक्त द्रव्य.

**–ज्ञ**–वि., **प्रकृतिं जानानः** ( चसू. २९.७ )
प्रकृति जाणणारा.

**–दर्शक**–वि., **स्वभावदर्शकम्** ( चचि. २४.७३ )
स्वभावदर्शक.

**–भाव**–पु., **साम्यम्** ( चशा. ६.१८ )
तीनही दोषांची समावस्था.

**–भूत**–वि.. **साम्ये स्थितः** ( चशा. ६.१८ )
समावस्थेत असलेला.

**–लघु**–वि., **स्वभावतः लघु द्रव्यम्** ( चसू. ५.५ )
नैसर्गिक गुणाने हलके द्रव्य.

**–वर्ण**–पु., **देहसमानवर्णः** ( चसू. १८.७ )
देहासारखा रंग.
**स्वाभाविकवर्णः** ( चशा. ८.५१ )
स्वाभाविक रंग.

**–विकारज्ञान**–न. **प्रकृतेर्विकारः तस्य ज्ञानम्** ( चसू. २९.७ )
प्रकृतीच्या विकारांचे ज्ञान.

**–विघात**–पु., **प्रकृतेः कारणस्य श्लेष्मादिरूपस्य विघातः** ( चवि. ७.१४ )
प्रकृतीच्या कफ पित्तादिरूप कारणांचा नाश.

**–विरुद्ध**–न., **स्वभावेन विरुद्धम्** ( सुसू. ३५.३९ )
स्वभावाच्या विरुद्ध.

**–वैशेष्य**–न., **स्वभावस्याऽऽधिक्यम्** (चसू. १८.५३)
स्वभावाचा अतिरेकीपणा.

**–संपद्**–स्त्री., **समवातादिप्रकृतिता** ( चशा. ६.३० )
समप्रकृति, समवातादि असणे, प्रकृतीच्या गुणांचा समुच्चय.

**–सात्म्य**–न., **प्रकृतेर्यत् सात्म्यं तत्** (चचि. १.२८)
प्रकृतीच्या सवईचे; प्रकृतीला मानवणारे; प्रकृतीला आत्मसात् झालेले.

**–सामान्य**–न., **समानकारणता, प्रक्रियते जन्यते अनया इति प्रकृतिः हेतुः कारणं वा, अतः प्रकृतिसामान्यं समानकारणत्वम्** (चसू.१८.४३) प्रकृतीची समान कारणे. समान कारणत्व कारण सामान्य.

**–स्थ**–वि., **मरणसमीपगतम्** ( **भूतं प्राणी वा** ) ( चसू. ९.२६ )
मृत्यूच्या समीप गेलेली व्यक्ति अथवा प्राणी.
वि., **आरोग्यवान्** ( सुसू. ४६.५०७ )
आरोग्ययुक्त.
**मनोवाक्कायेषु स्वेन भावेनावस्थितः** ( ड. सुक. ४.१८ )
शरीर मन वाचा यांच्या स्वाभाविक गुणकर्मांनी युक्त असणारा.

**–स्थत्व**–न., **दोषाणामविकृतकार्यकारित्वम्** ( ड. सुउ. ३९.१६०-६२ )
दोषांनी अविकृत कार्य करणे. दोषांचे अविकृत कार्यकारित्व.

**–स्थापन**–न., **भेषजम्, प्रकृतौ दोषसाम्ये स्थाप्यते प्राणी अनेन इति** ( चक्र. चवि. ६.२२ )
प्रकृतीला साम्यावस्थेत टिकविणारे ( उपचार ).

**–स्वप्न**–पु., **स्वस्याः प्रकृतेरनतिक्रमेण यथास्वं स्वप्नः, यथा वातप्रकृतौ ससंभ्रमम् आकाशगमनं, पित्तप्रकृतौ विद्युदुल्काहुताशप्रेक्षणं, श्लेष्मप्रकृतौ च कमलहंसचक्रवाकानां मनोज्ञजलाशयानाञ्च दर्शनम्** ( सुसू. २९.६७ )
प्रकृत्यनुरूप स्वप्न, जसे वातप्रकृतीच्या व्यक्तीला आकाशातून जाणे इ०, पित्तप्रकृतीच्या पुरुषाला वीज उल्का अग्नि इ० दिसणे, कफप्रकृतीला कमल, हंस, चक्रवाक पक्षि, व मनोहारी जलाशय इ० दिसणे.

**–स्वर**–पु., **स्वाभाविकस्वरः** ( चइ. १.१४ )
**शुभदायकस्वरः** ( चइ. १.१४ )
प्रकृतिप्रमाणे असणारा स्वर, शुभदायक स्वर.

**प्रकृष्टकर्णिक**–वि., **यस्य बस्तियन्त्रविशेषस्य कर्णिका त्र्यङ्गुलाधिका चतुरङ्गुला सन्निविष्टा च** ( ड. सुचि. ३६.८ )
बस्तीयंत्रातील कर्णिका, ही चकती तीन अंगुळांपेक्षा अधीक चार अंगुळे बसविलेले यंत्र.

**प्रकृष्टासन्नकारण**–न., **व्यवहितम् अव्यवहितञ्च कारणम्, ज्वरस्य रूक्षादि प्रकृष्टम् आसन्नं वातादि, तथा**

प्रकृष्टं रुद्रकोपः आसन्नं तु रूक्षादि, ज्वरादे रोगस्य समीपवर्ति दूरवर्ति च कारणम्
( चनि. १.४३ )
प्रकृष्टकारण म्हणजे दूरचे कारण, आसन्नकारण म्हणजे जवळचे कारण ज्याने ताबडतोब रोग झाला ते. ज्वराचे प्रकृष्टकारण रुद्रकोप व जवळचे कारण रूक्षादिकांचे सेवन, पुन्हा हे कारण दूरचे (प्रकृष्ट) व वातादि दोष हे जवळचे कारण.

**प्रकोथ**–पु., पूतिभावः ( सुचि. २३.५ )
कुजलेला. कुज. कुजणे.

**प्रकोप**–पु., प्रकृष्टः कोपः ( चसू. १७.११४ )
प्रकोप, फार कोप. पुष्कळ कोप.
**प्रकोपयतीति प्रकोपः हेतुः, प्रकुप्यति दोषोऽनेनेति प्रकोपः प्रकोपहेतुरिति** ( चचि. १२.३ )
ज्या कारणाने दोष बिघडलें ते.
**दोषगति० स्थानादुन्मार्गगमनम्** ( सुसू. १.३४ ) **द्वितीयक्रियाकालस्तत्र दोषाणां प्रकोपात् कोष्ठतोद-संचरणाम्लीकापिपासापरिदाहाऽन्नद्वेषहृदयोत्क्लेदाश्च जायन्ते** ( सुसू. २१.२७ )
दोषांची गति. स्वतःच्या उपचाराचा दुसरा काल. चिन्हे–कोठ्यात टोचणी, संचार, घशाशी आंबट येणे, तहान, आग, अन्न नकोसे वाटणे, छातीत जळजळ. संचयस्थानातच ठराविक मर्यादेपेक्षा दोष प्रमाणाने वाढणे.

**प्रकोपण**–न., **दोषान् प्रकोपयति इति प्रकोपणम्, वाय्वादीनां रूक्षत्वादिप्रकर्षेण दोषाणां कुपितत्वं कुर्वाणम्** ( चवि. ४.६; सुउ. २४.४ )
वातादि दोषांचा प्रकोप करणारे. अधिक दुष्टि करणारे.

**प्रकोष्ठ**–पु., **शारीर० मणिबन्धोपरिष्टात् कूर्परपर्यन्तो हस्तभागः अयमायामतः षोडशाङ्गुलः परिणाहतश्च द्वादशाङ्गुलः** ( सुसू. ३५.१२ )
मनगटापासून कोपरापर्यंतचा भाग म्हणजे प्रकोष्ठ. हा १६ अंगुळे लांब असून याचा घेर १२ अंगुळे असतो.

**प्रक्लिन्न**–वि., आर्द्रम् (सुउ. ६४.६ ) ओले.
**–काय**–वि., कुथितशरीरः ( कुष्ठिप्रभृतिः ) ( ड., सुउ. ६४.६१ )
ओलसर शरीराचा कुजलेले शरीराचा (कुष्ठी मनुष्य).
**–वर्त्मन्**–न., **नेत्ररोग० क्लिन्नवर्त्म** ( सुउ. १२.५२) नेत्ररोग. पापण्या ओल्या राहणे.

**प्रक्लिन्नात्मन्**–वि., अतितराम् आर्द्रदेहः (सुशा. ३.७-८)
अतीशय ओलेचिंब ( शरीर ).

**प्रक्लेदन**–वि., आर्द्रभावकरः ( द्रवगुणः )
( सुसू. ४६.५२० ) ओले करण्याचा स्वभाव.

**प्रक्षारयत्**–वि., **स्थानाद् भ्रंशयत् क्षपयंश्च** (चसू.१३.७१)
स्थानापासून सुटलेले, क्षीण होत असलेले.

**प्रक्षालन**–न., **उपक्रम० तोयादिभिः व्रणोत्संगादीनां क्षालनम्** ( सुसू. ७.१७ )
पाणी किंवा काढा यांनी व्रण इ० धुणे.

**प्रगण्टक**–पु., **कूर्परांसमध्यम्** ( रा.परि. १८.३१ )
कोपर आणि खांदा यांच्या मधला हाताचा भाग.

**प्रगल्भ**–वि., **धृष्टः** ( ड. सुक. १.१० ) मोठा, धीट.

**( प्रगल्भा )**–स्त्री., **प्रौढस्त्री, त्रिंशद्वर्षतः पञ्चाशद्वर्षपर्यन्तं वयोवती** ( र. ११.९६ )
प्रौढ स्त्री. तीस ते ५० वर्षे वयाची स्त्री.

**प्रगुण**–वि., **अनुगुणः, अनुकूलः** (सुनि. ३.२७ ) अनुकूल.

**प्रगुणीकरण**–न., ( परिव० ) **अस्पष्टस्य स्पष्टतापादनम्, व्यक्तीकरणम्** ( चचि. २६.१७ )
अस्पष्ट असेल ते स्पष्ट करणे.

**प्रगे**–अव्य., **प्रातः** ( असंसू. ३.४९ ) सकाळी.

**प्रग्रह**–पु., **वनस्पति० आरग्वधः** (चक्र. चसि. १०.३९)
बाहवा.
**कर्णिकारः** ( ध. १.२२१ ) कर्णिकार. बहावा.
**किरमालकः** ( सुक. ६.३ ) किरमालक. करंज.

**प्रघर्ष**–पु., **उपक्रम० घर्षणम्** ( चसू. ३.२९ ) घासणे.

**प्रघर्षण**–न., **उपक्रम० चूर्णेन घर्षणम्**
( चसि. १२.१५ ( ५ )
चूर्णाने शरीराचा भाग घासणे.

**प्रचण्ड**–पु., **वनस्पति० श्वेतकरवीरः** ( र. २२.१६७ )
रुई. पांढरी कण्हेर.

**( प्रचण्डा )**–स्त्री., **वनस्पति० श्वेतदूर्वा** ( रा. ८.२२९ )
**द्र० 'दूर्वा'** श्वेतदूर्वा. पांढरी दूर्वा.

**प्रचरण**–न., **प्रचर्यते भक्ष्यते इति प्रचरणं, भिक्षामूलं तण्डुलादि** ( चक्र. चवि. ८.१४९ )
भिक्षेकऱ्याच्या भांड्यातील तांदूळ इत्यादी.

**प्रचल**–वि., **स्वस्थानात्मच्युतः** ( अहृसू. १९.५१ )
स्वतःचे स्थान सोडलेला ( दोष ) मल, इ०

**प्रचलक**–पु., **कीट० गुणाः–सौम्यः, श्लेष्मप्रकोपणत्वात् कफविकारान् करोति** ( सुक. ८.१२-१५; असंउ. ४३ )

एक किडा. सौम्य, कफप्रकोपक म्हणून कफविकार करतो.

**प्रचलाक**–पु., पक्षि० मयूरः प्रचलति इतस्ततः पादन्यासं करोति नृत्यार्थमिति प्रचलाकः ( सुचि. १८.२८ ) मोर. नाचण्याकरिता पायांची तालावर हालचाल करणारा.

**प्रचलायन**–न., घूर्णनम् ( चचि. २४.४४ ) गरगर फिरणे.

**प्रचीबल**–पु., वनस्पति० मत्स्याक्षकः ( ड. सुउ. ३४.३ ) मत्साक्षी, सोमलता.

**( प्रचीबला )**–स्त्री., वनस्पति० काकजङ्घा ( ध. ४.२३ ) काकजंघा, कावळी.

**प्रच्छन**–न., उपक्रम० ( चसू. ११.५५ ) शस्त्रधारया अल्पच्छेदनम् ( चचि. ७.४० ) फासण्या मारणे. शस्त्राने चिरण्या घेणे.

**प्रच्छर्दन**–न., उपक्रम० वमनम् ( अहसू. ५.५४ ) ओकारी.

**प्रच्छादका**–वि., सिरास्नाय्वाद्याच्छादनकरी ( पेशी ) ( सुशा. ५.४० ) आच्छादन करणारी.

**प्रच्छान**–न., उपक्रम० क्षुरेण त्वगवच्छेदनम् ( र. १२.७६-८१ ) शस्त्रपदकरणम् ( सुचि. ९.१० ) फासण्या मारणे.

**प्रच्छाय**–वि., प्रवृद्धच्छायः ( देशः ) ( चचि. ९.१२ ) घनदाट छायेचा देश.

**प्रच्छित**–वि., कृतशस्त्रपदम् ( सुक. १.४९ ) फासण्या मारलेला.

**प्रच्छिन्न**–वि., प्रकर्षेण च्छिन्नम्, छेदनाकारवेदनायुक्तत्वात् छेदनप्रकर्षोऽत्र ( चइ. १०.१२ ) जरूरीपेक्षा अधिक छेद घेतलेला.

**प्रच्यवन**–न., प्रस्रवणम् ( र. १.६२-६३ ) पाझरणे.

**प्रच्युत**–वि., स्थानात् च्युतम् ( चसू. २६.४३ ) चलितः ( सुचि. ३३.३७ ) स्वस्थानाद् भ्रष्टम् ( सुसू. ४२.१०(२) ) स्वतःचे स्थानापासून सुटलेला.

**प्रजङ्घा**–स्त्री., शारीर० जङ्घायाः अधोभागः (कासू. २८) पोटरीच्या खालचा व घोट्याच्या वरचा भाग.

**प्रजनन**–न., शारीर० गुह्यप्रदेशः ( सुसू. २३.५ ) न., पुरुषस्य जननेन्द्रियम्, शेफः ( कासू. २८ ) पुरुषाचे जननेंद्रिय.

**–काल**–पु., प्रसूतिकालः ( चशा. ८.३६ ) प्रसूतीचा काल.

**–कुशला**–वि., लब्धगर्भायाः गर्भनिष्कासने कुशला ( स्त्री ) ( सुशा. १०.८ ) बाळंतीण सोडविण्यात कुशल स्त्री.

**प्रजा**–स्त्री., पुत्रपौत्रादयः ( सुशा. १०.५३ ) अपत्यम् ( चशा. २.२८ ) संतति.

**–दा**–स्त्री., वनस्पति० पुत्रदा ( रा. परि. ४.२७ ) हिंगणबेटाच्या झाडासारखी एक पुत्रदायक वनस्पति.

**–पति**–पु., दक्षः नृप० येन ब्रह्मण आयुर्वेदः अधीतः ( सुसू. १.१० ) दक्ष. ज्याने ब्रह्मदेवाकडून आयुर्वेद घेतला तो. देवता० उपस्थस्याधिदैवतं प्रजापतिः ( सुशा. १.७ ) शिश्नाची देवता.

**–सम्पद्**–स्त्री., सम्भवदपत्यगुणप्रकर्षः (चशा. ८.२१) उत्पन्न होणाऱ्या अपत्यगुणांचा प्रकर्ष.

**–स्थापनगण**–पु., द्रव्यगण० महाकषायवर्गे एको गणः ऐन्द्रीब्राह्मीशतवीर्यासहस्रवीर्याऽमोघाऽव्यथा-शिवाऽरिष्टावाट्यपुष्पीविष्वक्सेनकांता च (चसू. ४.१८) काढ्याचा एक वर्ग. कवंडळ ब्राह्मी दूर्वा (दोन) पाडळ केळ हिरडा कुटकी चिकणा गव्हला.

**प्रजागर**–पु., अतिजागरणम् (चनि. १.२१) अतिजाग्रण. निद्रानाशरोगः चतुःषष्टिसूतिकारोगाणामेकतमः ( काखिल. ११.७-१४ ) झोप नाहीशी होणे, रोगाचे नाव. प्रसूतिकेला होणारे ६४ विकारांतील एक.

**प्रजागरूक**–वि., अतिशयेन जागरणशीलः (सुशा.४.६४) जागरूक. अतिजाग्रण करणारा.

**प्रजाता**–स्त्री., प्रसूता, सम्यक्काले प्रसूता ( स्त्री ) ( सुनि. ९.२६; चनि. १.२८; सुशा. १०.२२ ) योग्य वेळी प्रसूत झालेली स्त्री.

**प्रजातमात्रा**–वि., सद्यःप्रसूता (काखिल. ११.१८) नुकतीच बाळंत झालेली.

**प्रजायिनी**–स्त्री., अचिरेण प्रसवमाना ( सुशा. १०.६ ) लौकरच प्रसूत होणारी.

**प्रजावरण**–न., प्रजारक्षकः बन्धविशेषः (का.रेवतीक. ८०) एक बंध. पट्टा.

**प्रजिघांसु**–वि., हन्तुमिच्छुः ( चइ. १२.१२ ) ठार मारण्याची इच्छा करणारा.

**प्रजीर्ण**–वि., लक्षण० विदग्धम् अन्नम् ( चशा. १.१११ ) करपलेले, घशाशी आंबट, करपट, आणणारे अन्न.

**प्रज्ञा**–स्त्री., बुद्धिः ( चसू. ७.५१ ) **कालत्रयार्थप्रतिभासिनी कालत्रयात्मिका बुद्धिः** ( ड. सुसू. ३५.१६; र. २.३) बुद्धि. भूतभविष्य वर्तमानकालाचा विचार प्रकट करणारी.

**प्रज्ञापराध**–पु., **प्रज्ञाप्रमादजन्यं कर्म कायवाङ्मनोभेदेन त्रिविधमप्यहितं कर्म प्रज्ञापराधः** ( चनि. १.३ ) बुद्धीच्या प्रमादाने घडलेले कृत्य.

"**धीधृतिस्मृतिविभ्रष्टः कर्म यत्कुरुतेऽशुभम्। प्रज्ञाऽपराधं तं विद्यात्सर्वदोषप्रकोपणम्**" ( चशा. १.१०२ )

धी, धृति, स्मृति, यांच्या विकृतीने जे अनिष्ट कर्म होते, ते सर्वदोषप्रकोपक असते. ह्या कारणाला प्रज्ञापराध म्हणतात.

**प्रणति**–स्त्री., **जनप्रह्वत्वलक्षणा लोकवन्द्यता** ( चचि. १.८ ) लोकमान्यता.

**प्रणयन**–न., **प्रीतिः** ( चशा. ४.१६ ) प्रेम.

**प्रणव**–पु., **ॐकारः ब्रह्म ईश्वरो वा; प्रणूयतेऽनेनेति प्रणवः, 'सत्यवाचकः प्रणवः' इति योगसूत्रम्** ( सुसू. २.४ ) ओंकार, ईश्वराचा वाचक.

**प्रणाडी**–स्त्री., **नाडीयंत्र० नलिका** ( चक्र. चसि. ९.१०३) नस्याची नळी.

**प्रणाद**–पु., **कर्णरोग० कर्णक्ष्वेडः कर्णनादः** ( सुउ. २०.७) कानात आवाज होणे.

**प्रणिधान**–न., **सम्यक्स्थापनम्** (सुचि. ६.४; सुचि. ३५.३२ ) **औषधस्य स्थापनप्रवेशनादिना उपयोजनम्** ( सुसू. ७.१४ ) औषध योग्य व्यवस्थेने ठेवणे व त्याची योजना करणे.

**–मात्रा**–स्त्री., **औषधप्रमाणम् यच्च निरूहबस्तौ प्रयोज्यम्** ( चसि. ३.५ ) औषधाचे प्रमाण. हे निरूहबस्तीमध्ये द्यावे.

**प्रणिपात**–पु., **नमस्कारः** ( चनि. ७.१६ )नमस्कार.

**प्रणिहितस्नेह**–वि., **कृतस्नेहः प्रयुक्तानुवासनबस्तिः** ( सुचि. ३७.६० ) स्नेहबस्ती दिलेला.

**प्रतत**–वि., **प्रसृतः** ( चवि. ८.९८ ) **विस्तीर्णम्** ( सुचि. ३८.३ ) लांब रुंद.

**विस्फारितम्** ( सुचि. २४.९६; अहृसू. २.३९ ) विस्फारित. पसरलेला, ताणलेला.

**प्रतनुक**–वि., **प्रकर्षेण तनु अल्पतरम्** ( सुसू. १६.३ ) अत्यंत लहान.

**प्रततमांस**–( परिव० ) न., **अजाजिमरिचप्रक्षेपपूर्वकमङ्गारादौ पक्वं पिशितम्** ( सुसू. ४६.३५६-५८ ) जिरे, मिरे टाकून विस्तवावर शिजविलेले मांस.

**प्रतमक**–पु., **रोग० तमकश्वासभेदः** ( मा. श्वासनि. ) श्वासाचा प्रकार. ज्वर मूर्च्छायुक्त तमक श्वासाची लक्षणे यात होतात.

**–श्वास**–पु., **रोग० श्वासभेदः** ( चचि. १७.६३ ) **ज्वरमूर्च्छायुक्तानि तथा तमकश्वासलक्षणानि तत्र भवन्ति द्र० 'श्वास'** तमकश्वासाला पित्तानुबंधाने होणारा प्रकार.

**प्रतमन**–( परिव० ) न., **लक्षण० तमसि प्रविष्टवद् भानम्** ( सुउ. ५६.७ ) अंधकारात प्रवेश केल्यासारखी स्थिति. तसे वाटणे.

**प्रतर**–पु., **सन्धिप्रकार० ग्रीवापृष्ठवंशयोः प्रतरः** ( सुशा. ५.२७; असंशा. ५.७७ ) एक संधीप्रकार. मान आणि पृष्ठवंश यांमधील सांधा.

**प्रतरण**–न., **नद्यादीनां बाहुभ्यां तरणम्** ( ड. सुचि. २४.९६ ) **इदं वातप्रकोपणम्** (सुसू. २१.१९) पोहणे. तरणे. हे वातप्रकोपक आहे.

**प्रतान**–पु., **विस्तारः** ( सुशा. ४.८ ) विस्तार.

**( प्रताना )**–स्त्री., **वनस्पति० गोजिह्वा** ( रा. ४.१८० ) गोजिव्हा.

**प्रतानवत्**–पु., **वनस्पति० सोमभेदः** ( सुचि. २९.६ ) वि., **विस्तारयुक्तः** ( सुनि. १६.६२ ) सोमाचा प्रकार. विस्तार असलेला.

**( प्रतानवती )**–स्त्री., **स्नायुप्रकार०** ( सुशा. ५.३१ ) **द्र० 'स्नायु'** स्नायूचा एक प्रकार.

**प्रतानिका**–स्त्री., **वनस्पति० प्रसारणी** ( ध. १.२८० ) प्रसारणी, चांदवेल.

**सारिवा** ( ध. १.१६१ ) सारिवा, उपळसरी, अनंतमूळ.

**प्रतान्त**–वि., **लक्षण० अतिक्षीणः** ( चसू. १३.५५ ) अतिक्षीण.

**–भोक्तृ**–वि., **पौनःपुन्येन अतिशयेन वा भुंजानः** ( का. भोजनकल्प २८ ) वारंवार पुष्कळ खाणारा, खादाड.

**प्रताप**–पु., **वनस्पति० अर्कः** ( रा. १०.२४ ) रुई. **श्वेतार्कः** ( रा. १०.३० ) मंदार. **स्वेदनम्** ( चसू. १८.५ ) शेक.

**–लङ्केश्वर**–पु., पारदयोग० सन्निपातादिघ्नः प्रत्येकं द्विपलयोः रसगन्धकयोः कज्जलीं कृत्वा तस्यां ताम्रभस्म गुग्गुलुमनःशिलाः प्रत्येकं त्रिपलमानं हरीतकीं कोलत्रयसंमितां षट्शाणं त्रिकटु, मधूकसारं वचारेणुकविडङ्गं मुस्तातालीसपत्रं नागकेशरमश्वगन्धां प्रत्येकं कर्षमात्रं, करञ्जबीजं वत्सनाभं चार्धकर्षं, भूधात्रीभङ्गाचूर्णमर्धकर्षं, समुद्रफलचूर्णं चार्धकर्षम् एकत्र अगस्त्यपत्रस्वरसेन त्रिकटुक्काथेन ज्वालामुखीरसेन भृङ्गराजरसेन च प्रत्येकं सप्तवारं मर्दयित्वा ततश्च पित्तपञ्चकेन पञ्चवारं मर्दयेत् करञ्जपत्रैर्वत्सनाभेन च धूपयेत् । अन्ततश्च पुनरार्द्रकस्वरसेनालोड्य तण्डुलाऽऽकारां गुटीं कुर्यात् । तामेतां मोहनेत्रप्रसुप्त्यादिलक्षणे सन्निपाते आर्द्रकस्वरसेन गुल्मे अजमोदासाहचर्येण वाते त्र्यूषणेन ग्रहण्यां च जीरकेण प्रयुञ्जीत ( र. १२.१२१ )
प्रतापलंकेश्वर नावाचे सान्निपातिकज्वरात द्यावयाचे औषध.
पारा गंधक आठ आठ तोळे घेऊन कज्जली करून ताम्रभस्म, गुग्गुळ, मनशीळ, प्रत्येक बारा बारा तोळे; हिरडा तीन तोळे; सहा मासे त्रिकटु; मोहाचा नार, वेखंड, रेणुकबी, वावडिंग, नागरमोथा, तालीसपत्र, नागकेशर, आसकंद, ही प्रत्येकी तोळा; करंज बी, बचनाग, भुईआवळी, भांग, समुद्रफळ, अर्धा अर्धा तोळा; सर्वांना हदग्याचा रस, त्रिकटूचा काढा, कळलावी, माक्याचा रस याच्या प्रत्येकी सात भावना द्याव्या. नंतर पाच पित्तांच्या पाच पाच भावना देऊन करंजपाने, व बचनाग यांची धुरी द्यावी, नंतर आल्याची भावना देऊन तांदळाएवढ्या गोळ्या कराव्या. **गुण**–मूर्च्छा, डोळ्याची झापड, इ० युक्त सन्निपात ज्वरात आल्याबरोबर, गुल्मात अजमोद्याबरोबर, वातात त्रिकटुबरोबर व ग्रहणीत जिरे यांबरोबर द्यावा.

पु., **पारदयोग० पारदगन्धकटङ्कणादिसिद्धोऽयं योगः विपादिकाख्यकुष्ठं हन्ति** ( र. २०.२७ )
प्रतापलंकेश्वर. विपादिका कुष्ठ नाशक.
सिद्धौषध. पारा, गंधक इ० युक्त योग.

**प्रतापन**–पु., वनस्पति० राजार्कः ( ध. ४.१६ )
पांढरी रुई, मंदार.

**प्रताम्यत्**–वि., प्रकर्षेण मूर्च्छन् ( सुसू. ३३.१८ )
जोरदार बेशुद्धि आलेला.

**प्रताम्यमान**–वि., मूर्च्छन् ( सुउ. ४४.३९ )
मूर्च्छा आलेला.

**प्रतिकर्मन्**–न., चिकित्सा,यथा वमनादिकर्म ( चशा. १.९०; चचि. १२.६ ) वमनादिकर्मे.

**( प्रतिकर्म )–प्रवृत्ति**–स्त्री., चिकित्साप्रवृत्तिः ( चइ. १२.५८ ) चिकित्सेची सुरुवात.

**प्रतिकष्ट**–वि., कष्टप्रदः ( कर्मजो व्याधिः ) ( सुउ. ४०.१६५ ) कष्टदायक कर्मज व्याधि.

**प्रतिकार**–पु., भेषजम्, प्रतिक्रियते चिकित्स्यते अवजीयते वा अनेनेति प्रतिकारो भेषजम् ( चसू. २६.१०४; सुउ. २०.८ )
औषध. ज्याच्या योगाने रोगाचा प्रतिकार केला जातो, उपचार केला जातो अथवा रोग जिंकला जातो असे ( औषधादि ).

**प्रतिकूल**–वि., निषिद्धम् ( ड. सुउ. ६०.५५ ) त्याज्य.

**प्रतिक्षिपत्**–वि., निष्कासयत् ( सुउ. ६.२४ )
बाहेर काढीत, बाहेर काढलेली.

**प्रतिखुर**–पु., मूढगर्भप्रकारेष्वेकः, निःसृतहस्तपादशिराःकायसङ्गी प्रतिखुरः ( सुनि. ८.४ )
मूढगर्भाचा एक प्रकार. ज्या गर्भाचे हात, पाय, डोके बाहेर आलेले आहे व धड अडकले आहे असा गर्भ.

**प्रतिगन्धा**–स्त्री., वनस्पति० बाकुची ( रा. ४.२२७ )
बावची.

**प्रतिग्रह**–पु., प्रतिगृह्णाति निष्ठीवनादिकमिति प्रतिग्रहः पात्र० ( चसू. १५.७ )
तस्त, पिकदाणी. ज्यात थुंकी इत्यादी टाकावयाचे ते भांडे.

**प्रतिग्रहण**–न., ( परिव० ) आलेपनम् ( सुचि. ७.३५ )
लेप घालणे.

**प्रतिच्छाया**–स्त्री., पुरुषाकृतिस्वरूपाऽऽतपे जले आदर्शे वा दृश्यमाना छायैव प्रतिच्छाया ( चइ. ७.९ )
पुरुषाच्या आकृतीची ( उन्हात ) पाण्यात किंवा आरशात दिसणारी पडछाया किंवा प्रतिबिंब.

**–मयी**–स्त्री., प्रतिच्छायारूपा ( चइ. ७.३ )
पडछायेसारखी. पडछायारूपी.

**प्रतिज्ञा**–स्त्री., तंत्रयुक्ति० प्रतिज्ञा नाम साध्यवचनं यथा "नित्यः पुरुषः" इति (चवि. ८.३०) साधनीयस्य अर्थस्य धर्मस्य वा यो निर्देशः स प्रतिज्ञा; साध्यनिर्देशः प्रतिज्ञा परिग्रहवचनं प्रतिज्ञा।

( गौ. १।१।३३ ) अत्र वात्स्यायनः–प्रज्ञापनीयेन धर्मेण धर्मिणो विशिष्टस्य निश्चयात्मकं विधानम् ( चसू. ३०.१८ )
प्रतिज्ञा. साध्य निर्दिष्ट वचन. जसे पुरुष हा नित्य आहे हे सिद्ध करावयाच्या धर्माचा निर्देश. साध्य निर्देश, ज्या धर्माबद्दल प्रतिज्ञा करावयाची त्या धर्माने युक्त. धर्मी करावयाचे विधान.
**निश्चयात्मकं विधानम्** ( चसू. ३०.१८ )
निश्चित अर्थाचे केलेले विधान.

**–हानि**–स्त्री., तंत्रयुक्ति॰ **प्रतिज्ञातार्थच्युतिः यथा प्रतिदृष्टान्तधर्माभ्यनुज्ञा स्वदृष्टान्ते प्रतिज्ञाहानिः, स्वपक्षे परपक्षधर्माभ्यनुज्ञा, स्वयं विशिष्य अभिहित-परित्यागः 'कथायां यच्च पक्षादि येन निर्दिष्टमादितः। तस्य तेन पुनस्त्यागः प्रतिज्ञाहानिरुच्यते' इति** ( तार्किकरक्षायां ३.१३४ )
प्रतिज्ञेच्या अर्थाचा भंग. विरोधी दृष्टांतास मान्यता देणे म्हणजे प्रतिज्ञाहानि.

**प्रतिजागृवि**–वि., **दत्तावधानः** ( अहृसू. ७.१ )
लक्ष्य दिलेला, लक्ष्य असलेला.

**प्रतिज्वर**–अ., **प्रतिविकारम्** ( अहृसू. १२.६२ )
प्रत्येक विकार.

**प्रतितन्त्रसिद्धान्त**–पु., तंत्रयुक्ति॰ **एकस्मिन् तन्त्रे नामशास्त्रेण प्रसिद्धः सिद्धान्तः** ( चवि. ८.३७ )
शास्त्रांतील प्रसिद्ध सिद्धांत. त्या त्या शास्त्रात प्रसिद्ध असलेला सिद्धांत.

**प्रतितर**–पु., **प्रविष्टजलोत्क्षेपकः, नाविकः, नौकावाहकः** ( सुसू. ३४.१९ )
नावेत शिरलेले पाणी उपसून फेकणारा.

**प्रतितूनी**–स्त्री., रोग॰ **स्वरूपम्–गुदोपस्थोत्थिता प्रतिलोमविसर्पिणी वेदना वेगैः पक्वाशयं याति** ( सुनि. १.८७ )
रोगाचे नाव. शिश्न व गुदाकडून पक्वाशयाकडे येणारी कळ.

**प्रतिधूप**–पु., **आघ्रातधूपो येन धूपेन पुनर्धूप्यते तादृशो धूपः** ( काधूमकल्प. )
धुरी दिल्यानंतर पुन्हां त्याला जी धुरी द्यावयाची ती.

**प्रतिनिविष्टपरिषद्**–स्त्री., परिषद्॰ **स्वसौहार्दाभावेन निविष्टाः सभ्या यत्र सा** ( चवि. ८.२० )
परिषदेचा प्रकार. स्नेहमय भावनेने जेथे सभ्य एकत्र आले आहेत ती सभा.



**प्रतिपक्षशीलन**–न., **विपरीतगुणाभ्यासः यथा सप्तविधानां सहगर्भजातपीडाद्युद्भवानां रोगाणामुपशमार्थं यथास्वं विपरीतगुणाभ्यासः** ( असंसू. २२ )
विपरीत गुणांचे सेवन. सहज रोगांसुद्धा सातही विकार शमण्याकरिता विपरीत गुणांचे सातत्याने सेवन. उदा॰—गर्भाच्या जन्मकाळी संभाव्य सात प्रकारच्या आपत्तिरूप रोगशमनासाठी यथायोग्य विपरीत गुणांचे उपचार.

**प्रतिपत्ति**–स्त्री., तंत्रयुक्ति॰ **प्रतिपत्तिर्नाम यो यथा विकारः प्रतिपत्तव्यस्तस्य तथाऽनुष्ठानज्ञानम्** ( चवि. ८.१३२ )
जो जसा विकार असेल तशी त्याची चिकित्सा करणे.
**ज्ञानम्** ( चसू. ७.५५ ) ज्ञान.
**उत्पन्नायाम् आपदि झटिति कर्तव्यकरणम्** ( (चक्र.) चवि. ८.८६ )
समयसूचकता. उत्पन्न झालेल्या संकटाचे वेळी जे झटकन करावयाचे ते करणे.
**शास्त्रम्** ( चवि. ८.४ ) शास्त्र.

**–ज्ञ**–वि., **तदात्वे तत्कालं कर्तव्यज्ञः** ( चसू. १९.७ )
योग्य समयी योग्य कर्तव्य तात्काल करणारा.

**प्रतिपत्रफला**–स्त्री., वनस्पति॰ **कुडुहुञ्ची** ( रा. ७.२८० )
लहान कारले. मेका.

**प्रतिपद्**–स्त्री., **प्रतिपत्तिः, बुद्धिः, धारणा** ( अहृसू. २.३० ) बुद्धि.

**प्रतिपन्न**–वि., **प्राप्तम्** ( सुचि. ७.३५ ) मिळालेले.

**–परिग्रह**–वि., **पाल्यत्वेन स्वीकृतम्** ( अहृसू. ८.३७ )
पाळायला घेतलेले.

**प्रतिपर्णी**–स्त्री., वनस्पति॰ **द्रवन्ती** ( रा. ५.३४७ )
उंदीरकानी. द्रवन्ती.

**प्रतिपीत**–वि., **मात्रया पीतवान्** ( सुसू. १४.३१ )
प्रमाणाने पान केले असा.

**प्रतिपूरण**–न., **शून्यभूतस्य पुनः पूरणम्** (सुचि. २४.२६ )
रिकामे झालेले परत भरणे.

**प्रतिप्रसव**–पु., **सामान्यतो निषेधेऽपि विशेषार्थं निषिद्धस्य पुनर्विधानम्** ( ड. सुचि. ५.३९ ) **यथा ऊरुस्तम्भे स्नेहादेर्निषेधेऽपि कफमेदसोः क्षये स्नेहादेस्तत्र विधानं क्रियते ।**
एखाद्या विधीचा सर्व सामान्य निषेध असला तरी विशिष्ट गोष्टीकरता तो विधि करणे. उदाहरण–ऊरुस्तंभरोगात स्नेह वगैरे देऊ नयेत असा नियम

असता कफ व मेदक्षय झालेल्या क्षयरोगात त्या स्नेहादिविधीचा निषेध नाही.

**प्रतिबाधक**–वि., प्रतिकारकः ( चचि. ८.१२४ ) प्रतिकार करणारा, नाशक.

**प्रतिबुद्धतर**–वि., अधिकतरं प्रबुद्धम् ( सुशा. ३.३० ) विशेष जागृत.

**प्रतिबोधन**–न., जागृतिः ( सुशा. १०.४६ ) जागे होणे. उन्मेष ( ड. सुउ. ६.२६ ) डोळे उघडणे.

**प्रतिभा**–स्त्री., प्रज्ञा ( चसू. २७.३४९; अहृसू. ५.६३ ) अलौकिक बुद्धि.

**प्रतिभान**–न., नवनवोन्मेषशालिनी बुद्धिः । तरतरीत बुद्धि, नव्या नव्या कल्पना सुचणारी बुद्धि. प्रतिभान ( चवि. ८.१८ ) प्रतिभा.

**प्रतिभू**–पु., लग्नकः, प्रतिनिधिः प्रतिरूपः ( सुचि. २४.१०१ ) जामीन.

**प्रतिभोग**–पु., उपभोगः ( चसू. १५.३ ) उपभोग.

**प्रतिभोजन**–न., अनन्तरभोजनम् ( चसि. ३.७० ) शोधन दिल्यानंतर द्यावयाचे भोजन.

**प्रतिमर्श**–पु., नस्य० तत्प्रमाणम् द्विबिन्दुकः ( सुचि. ४०.५३ ) नित्यसेवने हितः ( चचि. २६.२७७; अहृसू. २०.३२ ) तत्सेवनकालः– तल्पोत्थितेन, प्रक्षालितदन्तेन गृहान्निर्गच्छता, व्यायामव्यवायाध्वपरिश्रान्तेन, मूत्रोच्चारकवलाञ्जनान्ते, भुक्तवता, छर्दितवता, दिवास्वप्नोत्थितेन, सायं चेति चतुर्दशकालेषु प्रतिमर्श उपादेयः ( सुचि. ४०.५१ ) गुणाः—तल्पोत्थितेनाऽऽसेवितः प्रतिमर्शः रात्रावुपचितं नासास्रोतोगतं मलमुपहन्ति मनःप्रसादं च करोति । प्रक्षालितदन्तेनाऽऽसेवितो दन्तानां दृढतां वदनसौगन्ध्यं चाऽऽपादयति । गृहान्निर्गच्छता सेवितो नासास्रोतसः क्लिन्नतया रजसा धूमेन वा न बाध्यते । व्यायाममैथुनाध्वपरिश्रान्तेनाऽऽसेवितः श्रममुपहन्ति । मूत्रोच्चारान्ते सेवितो दृष्टेर्गुरुत्वमपनयति । कवलाञ्जनान्ते सेवितो दृष्टिं प्रसादयति । भुक्तवता सेवितः स्रोतसां विशुद्धिं लघुतां चाऽऽपादयति वान्तेनाऽऽसेवितः स्रोतो-विलग्नं श्लेष्माणमपोह्य भक्ताऽऽकाङ्क्षामापादयति, दिवास्वप्नोत्थितेनाऽऽसेवितो निद्राशेषं गुरुत्वं मलं चाऽपोह्य चित्तैकाग्र्यं जनयति, सायं चाऽऽसेवितः सुखनिद्राप्रबोधं चेति (सुचि. ४०.५२) द्र० 'नस्य'। सोऽयं प्रतिमर्शः क्षामक्षततृष्णामुखशोषवृद्धबालभीरुसुकुमारेषु अपि अकालवर्षदुर्दिनेष्वपि च योज्यः ( असंसू. २९ ) प्रतिमर्श नांवाचे नस्य. हे दररोज करावयास हरकत नाही. त्याचे प्रमाण–दोन थेंब द्रव्य. प्रतिमर्श नस्य करण्याचा काल– सकाळी उठल्याबरोबर, दांत घासून झाल्यावर, घरातून बाहेर पडताना, व्यायाम-मैथुन-मार्ग चालण्याचे श्रमानंतर, मल-मूत्र विसर्जनानंतर, चूळ भरल्यानंतर, अंजनानंतर, भोजन केल्यानंतर, ओकारीनंतर, दिवसा झोपून उठल्यावर, आणि संध्याकाळी अशा चौदा वेळी प्रतिमर्श नस्य करावे. ( १ ) सकाळी उठल्याबरोबर नस्य केल्याने रात्री झोपेत साठलेला मल निघून जातो, मन प्रसन्न होते. ( २ ) दन्तधावनानंतर नस्य केल्याने दात घट्ट होतात, तोंडाची घाण येत नाही. ( ३ ) बाहेर जाताना नस्य केल्याने बाहेरील धूळ व धूर यांचा त्रास होत नाही. व्यायाम-मैथुन, मार्ग चालल्यानंतर नस्य केल्याने श्रमांचा नाश होतो. मलमूत्रविसर्जनानंतर नस्य केल्याने दृष्टीचा जडपणा नाहीसा होतो. कवलादिक्रियेनंतर नस्य केल्याने दृष्टि प्रसन्न होते. जेवणानंतर नस्य घेतल्याने स्रोतसांची शुद्धि आणि लघुता उत्पन्न होते. ओकारीनंतर नस्य घेतल्याने स्रोतसे मोकळी होतात, कफ सुटा होतो, भोजनाची इच्छा होते. दिवसा झोप झाल्यावर नस्य घेतल्याने शिल्लक असलेली झोप नाहीशी होऊन जडत्व जाते आणि मलनाश होऊन चित्ताची एकाग्रता होते. संध्याकाळी नस्य घेतल्याने रात्री झोप चांगली येते व प्रसन्न मनाने जाग येते. थकलेला, उरःक्षतरोगी, तहानेलेला, मुखरोगी, क्षयरोगी, वृध्द, बाल, भित्रा, सुकुमार या सर्वांनी अकाली पाऊस पडला असता व अभ्र असताही प्रतिमर्श नस्य घेण्यास अडचण नाही.

उपक्रम० अङ्गुल्यादिघर्षणम्, अनवबद्धशल्योद्धरणार्थं पञ्चदशोपायेष्वेकः ( सुसू. २७.४ ) बोट वगैरेनी चोळून विशेष खोल नसलेले शल्य काढणे. असे शल्य काढण्याच्या १५ उपायांपैकी एक उपाय.

**प्रतिमार्ग**–अ., मार्गविरुद्धम् ( चनि. २.१९ ) विरुद्धमार्ग.

**प्रतिमेष**–पु., योग० ब्राह्मीपलाशपित्तलादिसाधितोऽयं वल्मीकनाशी ( र. २५.६१-६५ )
सिद्ध औषध. ब्राह्मी पळस पितळभस्म इत्यादी युक्त योग. वारूळविकारनाशक.

**प्रतिरूपक**–पु., अन्यथारूपकारी, प्रतिरूपेण ब्रह्मचार्यादिवेशेन चरतीति प्रतिरूपकः ( चसू. २९.८ )
वेशधारी. ब्रह्मचारी, संन्यासी इत्यादिकांचा वेश धारण करणारा.

**प्रतिलोम**–वि., विपरीतम् यथा सर्वशल्याहरणं शल्यप्रवेशमार्गेणैव क्रियते ( सुसू. २७.६ ) विरुद्ध मार्गे.
विमार्गगम् ( चसू. ५.४८ ) विरुद्धमार्गी गेलेले.
लोमाभिमुखम् ( सुसू. १८.४ ) केसांच्या दिशेने.
**-ग**–वि., विपरीतमार्गगतः ( चइ. ७.२० )
विरुद्ध मार्गाने गेलेले.

**प्रतिवचनविधि**–पु., उत्तरप्रदानप्रकारः ( चवि. ८.८२ )
उत्तर देण्याचा प्रकार.

**प्रतिवत्सत्**–वि., प्रवस्तुमुद्यतः, प्रविवत्सन्नाम प्रवस्तुम् इतो निर्गन्तुमिच्छन् ( चइ. १२.४३ )
बाहेर जाऊ इच्छिणारा. ( शरीरातून ) बाहेर जाऊ इच्छिणारा ( प्राण ).

**प्रतिवाक्य**–न., प्रतिवादिनो वचनम् ( चवि. ८.६७ )
प्रत्युत्तर, प्रतिवादीचे उत्तर.

**प्रतिवात**–पु., अभिमुखो वातः ( सुचि. २४.९६ )
समोरून येणारा वारा.

**प्रतिवाद**–पु., प्रतिपक्षः ( चसू. २५.२७ ) विरुद्ध पक्ष.

**प्रतिवाप**–पु., प्रक्षेपद्रव्यम् ( सुचि. ४.२९ )
काढ्यात नंतर घालण्याचा पदार्थ.
प्रक्षेपः ( र. २.१७२-७३ )
काढा इ० द्रवयोगात चूर्ण, कल्क इ० मिसळणे.

**प्रतिवापक**-पु., प्रक्षेपः ( र. २.१७२-७३ )
प्रक्षेप. धातु पातळ करून त्यात घालावयाचे द्रव्य.

**प्रतिविशेष**–पु., प्रतिनियतो विशेषः, वैशिष्ट्यम् ( चचि. ४.४ ) वैशिष्ट्य.

**प्रतिविष**–न., विजातीयं विषम्, यथा स्थावरस्य जङ्गमं, जङ्गमस्य स्थावरं विषम् ( इन्दु, असंउ. ४८.३७५ )
विजातीय विष. जसे स्थावर विषाच्या विरुद्ध जंगम विष. जंगमाचे प्रतिविष स्थावर विष मारक विष.

**( प्रतिविषा )**–स्त्री., वनस्पति० अतिविषा ( चचि. १९.२२ ) अतिविषाभेदः, श्यामकन्दा ( सुउ. ४०.३७; असंसू. ८.७८; ध. १.१०; र. १६.४५ )
अतिविष. प्रकार, काळ्या कंदाची.

**प्रतिश्या**–स्त्री., रोग० प्रतिश्यायः ( चसू. १७.१३ ) पडसे.

**प्रतिश्याय**–पु., रोग० नासिकातः श्लेष्मस्रवणम् ( चनि. ६.१३ ) वातं प्रत्यभिमुखं श्यायो गमनम्, कफादीनां यस्मिन्, स प्रतिश्यायः ( ड., सुउ. २४.१ ) अतिस्त्रीसङ्गात् शिरःप्रतपनात् नासाप्रविष्टधूमरजोनिचयात् मूत्रादिसंधारणात् प्रतिश्यायः सद्यः समुत्पद्यते ( सुउ. २४.३ ) तस्य पूर्वरूपाणि–शिरोगुरुत्वं छिक्काप्रवृत्तिरङ्गमर्दउद्धर्षितरोमाञ्चत्वं ज्वरारोचकादय उपद्रवा भवन्ति ( सुउ. २४.५ ) स पञ्चविधः —वातिकप्रतिश्यायलक्षणम्–नासाऽऽध्माता पूरिता च भवति। अल्प सिङ्घाणस्रावः। गलताल्वादीनां शोषः। शङ्खनामकास्थिविशेषयोस्तोदः स्वरस्याल्पप्रतिरोधः स्वरविकृतिर्वा। चिह्नान्येतानि वातप्रतिश्याये भवन्ति (सुउ.२४.६-७) पैत्तिकप्रतिश्यायलक्षणम्–घ्राणादीषत्पीतोष्णश्च स्रावो भवति।
पैत्तिकप्रतिश्यायार्दितो नरः कृशः पाण्डुस्तृट्पीडि संतप्तश्च भवति। अकस्माध्दूमयुतवह्निवमनं नासातो मन्यते पित्तप्रतिश्यायी ( सुउ. २४.७ ) कफकृतप्रतिश्यायलक्षणम्–व्याधावस्मिन् घ्राणाच्छुक्लः शीतः कफो वारं वारं स्रवति। नरः शुक्लवदवभासते। अक्ष्णोः शोफः शिरोमुखयोर्गुरुत्वं च भवति। शिरोगलादिष्वतीव कण्डूः अनुभूयते ( सुउ. २४.९ ) रक्तजप्रतिश्यायलक्षणम्–अस्मिन् व्याधौ रक्तस्रुतिस्ताम्राक्षत्वमुरोघातपीडोच्छ्वासवदनयोर्दुर्गन्धित्वं गन्धज्ञानाऽभावः कृष्णश्वेतादिकृमिवत्त्वमित्यादीनि चिह्नानि भवन्ति। कृमिजन्यशिरोरोगसमानचिह्नोऽयं व्याधिः ( सुउ. २४.१२ ) सान्निपातिकप्रतिश्यायलक्षणम्–त्रिदोषजे प्रतिश्याये वातादिजानां प्रतिश्यायानां पीनसानां च चिह्नानि भवन्ति। व्याधिरेषः कारणाद्विना भवति; विना कारणं विनिवर्तते च। सांनिपातिकप्रतिश्यायोऽसाध्यो, विदेहोक्तत्वात् ( सुउ. २४.११ ) प्रतिश्यायचिकित्सा–नवे प्रतिश्याये केवलसर्पिषः पानमपच्यमाने स्वेदः, पक्के घने नस्यं विरेचनधूमपानादि कवलग्रहाश्च, किं च 'निवातशय्यासनचेष्टनानि मूर्ध्नो गुरूष्णं च तथैव वासः। तीक्ष्णा विरेकाः शिरसः सधूमा रूक्षं यवान्नं विजया च सेव्या॥' ( सुउ. २४.२१ )

वाताच्या गतीला अनुसरून कफादिदोष ज्या विकारात नाकाच्या मार्गाने बाहेर स्रवतात त्याला प्रतिश्याय किंवा पडसे म्हणतात. **कारणे**—अतिस्त्रीसमागम, डोके तापणे, नाकात धूर किंवा धूळ शिरणे व मलमूत्रादीचे वेग अडवल्याने ताबडतोब पडसे होऊ शकते. **लक्षणे**—डोके जड, शिंका येणे, आंग दुखणे आंगावर रोमांच, थोडा ताप व अरुची ह्या उपद्रवांनी सुरवात होते.

त्याचे पाच प्रकार आहेत (१) वातज (२) पित्तज (३) कफज (४) रक्तज आणि (५) सान्निपातिक.

**वातिक** पडशामध्ये नाकामध्ये वायूचा अवरोध झाल्यामुळे नाक फुगीर होते. काहीतरी अडकल्यासारखे वाटते. शेंबुडाचा स्राव होतो. गळा, तालु यांचा शोष होतो. आख–शंखास्थि यांना विशेष टोचणी होते, आवाजाचा किंचित् अवरोध होतो किंवा स्वर बदलतो. **पित्त** प्रतिश्यायामध्ये नाकात थोडासा पिवळा, उष्ण असा स्राव होतो. पैत्तिक प्रतिश्यायाचा माणूस कृश, पाण्डुरतायुक्त, तहान लागणारा संतप्त असतो. एकाएकी नाकातून धुरासह अग्निच्या ज्वाळा बाहेर पडताहेत किंवा काय असे त्यास वाटते.

**कफ** प्रतिश्यायामध्ये थंड कफ वारंवार स्रवतो. माणूस फिक्कट होतो. डोळे सुजलेले दिसतात. डोकेतोंड जड वाटते. आणि डोके व गळ्यात अतिशय खाज सुटते म्हणजे खवखवते.

**रक्तज प्रतिश्याय**–या विकारामध्ये नाकातून पडश्याबरोबर रक्तस्राव होतो. डोळे तांबडे लाल, छाती दुखते, श्वासाला आणि तोंडाला फार घाण येते, नाकाने वास कळत नाही. काळे, पांढरे, बारीक कृमि होतात. कृमिजन्य शिरोरोगासारखी चिन्हे होतात. **सान्निपातिक** पडशामध्ये त्रिदोषांची चिन्हे होतात. हा विकार कारणाशिवाय होतो. आणि कारणाशिवाय नाहीसा होतो. विदेहमताप्रमाणे सान्निपातिक प्रतिश्याय असाध्य आहे. प्रतिश्यायाची (पडशाची) चिकित्सा– नव्या पडशामध्ये तूप प्यावयास द्यावे. अपक्क पडसे असता घाम काढावा, पिकलेल्या घट्ट पडशावर विरेचननस्य धूम्रपानादि चिकित्सा किंवा गुळण्या करण्यास सांगावे. वारा नसलेल्या ठिकाणी शय्या, आसन, विहार वगैरे सर्व करावे. डोक्यास उष्ण, घट्ट, जाड कपडा बांधावा, तीक्ष्ण रूक्ष यवान्नपान करावे, हिरडा खावा.

**प्रतिषेध**–पु., **प्रतिषिध्यते प्रतिक्रियते इति प्रतिषेधः प्रतिकारः, चिकित्सितम्** ( ड. सुउ. ९.१ )
चिकित्सा, उपचार.
**निवृत्तिः** ( सुचि. २७.११ ) निवारण.

**प्रतिषेधन**–न., **तंत्रयुक्ति० अपदेशादिभिस्तन्त्रयुक्तिभिः परपक्षदूषणम्** ( ड. सुउ. ६५.५ )
निषेध. अपदेश म्हणजे प्रतिपक्ष्याचा मुद्दा सकारण नाकारणे वगैरे इत्यादी तंत्रयुक्तीने दुसऱ्या पक्षाला दूषण देणे.

**प्रतिष्ठा**–स्त्री., **कार्यकरणाऽविरोधेनाऽवस्थानम्** ( चसू. ३०.५ )
कार्य व साधने यांची परस्परानुकूलता.

**प्रतिष्ठापना**–स्त्री., **तंत्रयुक्ति० परप्रतिज्ञाया विपरीतार्थस्थापना, यथा–नित्यः पुरुष इति प्रतिज्ञायामनित्यः पुरुष इति प्रतिष्ठापना** ( चवि. ८.३२ )
प्रतिपक्षाच्या विरुद्ध मुद्दा प्रस्थापित करणे. जसे नित्य पुरुष या प्रतिज्ञेमध्ये अनित्य पुरुष ही प्रतिष्ठापना.

**प्रतिष्ठित**–वि., **अवस्थितम्** ( सुचि. २.५० )
दृढमूळ, रुतलेले.

**प्रतिसंसर्ग**–( परिव० ) पु., **आवापः कल्पादिषु द्रव्यप्रक्षेपः** ( सुचि. ६.९ )
सिद्ध झाल्यावर मागून घातलेले द्रव्य.

**प्रतिसंसृष्टभोजन**–( परिव० ) न., **यवाग्वादिक्रमेण भोजनम्** ( सुचि. ६.१८ )
पथ्याचे क्रमाने ( मंड, पेज इ० ) भोजन.

**प्रतिसंस्कृत**–वि., **पुनः संस्कारितम्** ( चसू. १ ) **समाप्तिसूत्रम्.**
प्रतिसंस्कार केलेले पुन्हा संस्कार केलेले. समाप्तीचे सूत्र.

**प्रतिसर**–पु., **माला** ( का. रेवती क. ८ ) माळ.
( **प्रतिसरा** )–स्त्री., **कार्पाससूत्रवेणिका** ( इन्दुः असंउ. ४ )
दोऱ्याची लडी.

**प्रतिसारण**–न., **उपक्रम० घर्षणम्, तच्च चतुर्विधम्–कल्को रसक्रिया, क्षौद्रं चूर्णं च, वाग्भटमते प्रतिसारणं त्रिविधम्, प्रतिसारणमङ्गुल्यग्रप्रणीतं कुर्वीत** ( सुचि. ४०.६९-७०; अहसू. २२.१३ )
एक चिकित्साप्रकार. व्रणोपचार, घासणे. प्रकार चार (वाग्भटाच्या मताने प्रकार तीन)–चटणी, चूर्ण

काकवी सारखे व मध. हाताच्या बोटाच्या टोकावर मावेल एवढे म्हणजे बोराच्या आठळीइतके प्रमाण असावे.

(परिव०) **अवचूर्णनम्** ( चचि. १९.५० )
अवचूर्णन. चूर्ण. भुरभुरणे-टाकणे.

( परिव० ) लेपः ( सुचि. ३.१५ ) लेप.

**व्रणस्य षष्ट्युपक्रमेष्वेकः** ( सुचि. १.८ )
व्रणाच्या ६० उपचारांपैकी एक.

**प्रतिसारणीयक्षार**–पु., कल्प० **क्षारभेदः स त्रिविधो मृदुर्मध्यस्तीक्ष्णश्च** ( ड. सुसू. ११.११ ) द्र० **'क्षार'**
प्रतिसारणासाठी असणारे क्षार. प्रकार तीन. मृदु, मध्यम व तीक्ष्ण.

**प्रतिसूर्यक**–पु., सविषकीट० **सरटः, पञ्चगोधेरकेष्वेकः, तेन दष्टस्य शोफो दाहरुजौ च भवतः, एतद्दष्टे सर्पदष्टवच्चिकित्सितं कार्यम्** ( सुक. ८.२८ )
सरडा. हा चावला तर सूज, दाह, ठणका निर्माण होतात; सर्प चावल्याप्रमाणे उपचार करावे.

**प्रतिसोमा**–स्त्री., वनस्पति० **सौम्या** ( रा. परि. ३.३१ )
पाने नसलेली कांडे व काड्यांच्याच शाखा असलेली सोम या महौषधीसारखी वेल.

**प्रतिस्रोतस्**–न., **विरुद्धदिक्को जलप्रवाहः** ( चचि. २७.५९ ) उलटा वहाणारा प्रवाह.
अ., **प्रवाहविरुद्धम्** ( चचि. २७.५९ )
प्रवाहाच्या विरुद्ध.

**प्रतिहास**–पु., वनस्पति० **करवीरः** ( ध. ४.१ ) कण्हेर.

**प्रतीकार**–पु., **चिकित्साप्रयोज्यं रोगस्य शमनम्** ( चसू. १५.३; सुउ. १७.३; अहसू. १३.३६ )
रोगप्रतिकार, रोगशमन.

**–गौरव**–न., **चिकित्साकाठिन्यम्** ( चवि. ३.४)
चिकित्सेतील कठिनता.

**प्रतीकारतस्**–अव्य., **चिकित्सानुसारम्** ( सुचि. २३.३ )
चिकित्सेला अनुसरून.

**प्रतीघातभेद**–पु.,**प्रत्याघातः** ( असंनि. ३ )
कारणभेदाने होणारे आघात. भिन्न-भिन्न आघात; निरनिराळ्या प्रकाराने होणारा प्रतिबंध.

**प्रतीनाह**–पु., कर्णरोग० **पित्तौष्ण्येन शोषितः कर्णगतः श्लेष्मा गूथकं जनयति, स च गूथको द्रवतां गत्वा यदा घ्राणमुखमायाति शिरसश्चाभितपनं करोति, तदा प्रतीनाह इत्युच्यते** (सुउ. २०.१२;र.२४.१)
कर्णरोग. पित्ताच्या उष्णतेमुळे कानातील कफ (ओलावा) वाळून त्याचा गोळीसारखा मळ निर्माण होतो. तो मळ जेव्हा पातळ होऊन नाकाच्या तोंडाशी येतो व त्यामुळे डोक्यासंबंधी विकार होतात त्यास प्रतीनाह म्हणतात.

**नासारोग० तल्लक्षणम्–सवातः कफ उच्छ्वासमार्गं निरुणद्धि** ( चचि. २६.११२ )
नाकाचा रोग. वायूसह कफ उच्छ्वासाचा मार्ग अडवतो.

**प्रतीप**–वि., **प्रतीपं सात्म्यविपरीतमिति गङ्गाधरः** ( चचि. २०.१८; असंशा. १२ )
सवईच्या विपरीत. आत्मसात होणाऱ्या द्रव्य गुणकर्मांच्या विपरीत.

**–ता**–स्त्री., **प्रतिकूलता, वैपरीत्यम्** ( चइ. १२.५९; असंशा. १० ) विपरीतत्व. प्रतिकूल असणे.

**–दन्त**–( परिव० ) पु., **वक्रो दन्तः** ( कासू. २०.८ )
वाकडे दात.

**प्रतीवाप**–पु., **क्वाथादौ द्रव्याणां निक्षेपणम्** ( सुचि. ३७.२१ ) काढ्यात नवीन पदार्थ घालणे.

**कल्कः** ( सुचि. २३.११; र. ८.५४ )
चटणी, औषध वाटून केलेला गोळा.

**प्रतुद**–पु., पक्षिगण० ( चचि. १८.१८५ ) **प्रतुद्याभिहत्य भक्षयतीति प्रतुदः, ते च कपोतपारावतभृङ्गराजपरभृतकोयष्टिककुलिङ्गगृहकुलिङ्गगोक्ष्वेडकडिण्डिमाणवकशतपत्रकमातृनिन्दकभेदाशिशुकसारिकावल्गुलीगिरिशालट्टालट्टूषकसुगृहाखञ्जरीटहारीतदात्यूहप्रभृतयः** ( सुसू. ४६.६७ ) **गुणाः– मधुराः कषायाः शीता मरुत्कराः पित्तश्लेष्महरा बद्धमूत्राल्पवर्चसः** ( सुसू. ४६.६८ )
चोचीने टोचून खाणारा कबूतर, पारवा, कोकिळ इ० पक्षी० त्यांचे गुण—मधुर, कषाय, शीत, वातकर, पित्तकफनाशक, मूत्रावरोधक आहेत.

**प्रतूणी**–स्त्री., **रोग० प्रतितूनी** ( सुसू. ४६.३७३ )
एक वातव्याधी. प्रतूनी. पहा "प्रतूनी."

**प्रतूनी**–स्त्री., वातव्याधि० **प्रतितूनी 'गुदोपस्थोत्थिता सैव प्रतिलोमविसर्पिणी। वेगैः पक्वाशयं याति प्रतितूनीति सा मता'** ( सुचि. ५.२५; असंनि. ११.५०; अहसू. ६.३३; र. १८.११६-१७ )
एक वातव्याधी. जी वेदना गुद व शिश्न यात उत्पन्न होऊन उलट वर पसरून वेगाने पक्वाशयात येते ती.

**प्रतोली**–स्त्री., व्रणबन्ध० **चतुर्दशबन्धविशेषाणामन्यतमः अयं ग्रीवामेढ्रयोर्विधेयः** ( सुसू. १८.१७-१८ )
द्र० **'मुतोली'**

व्रणावर बांधल्या जाणाऱ्या बंधाचा प्रकार. मुतोली. हा मान व शिश्न यांवर बांधण्याला उपयुक्त.

**प्रत्यक्पर्णी**–स्त्री., **वनस्पति० मूषिकपर्णी** ( चक्र. चक .११.१४ ) उंदीरकानी.

**प्रत्यक्पुष्पा**–स्त्री., **वनस्पती० अपामार्गः** ( सुसू. ४३.३; चसू. १.८२-८५ ) **इयं शिरोविरेचनानां श्रेष्ठा** ( चसू. २५.४० )
आघाडा, हा डोक्याचे रेचक औषधात श्रेष्ठ.

**प्रत्यक्पुष्पी**–स्त्री., **वनस्पति० अपामार्गः** ( ध. १.२६०; चक. १.१४; र. २९.११२; असंसू. १३.३; अहृसू. १५.२८ ) आघाडा.

**प्रत्यक्श्रेणी**–स्त्री., **वनस्पति० मूषिकपर्णी** ( रा. परि. ३.२२ ) उंदीरकानी.
**सुतश्रेणी** ( रा. परि. ४.१६ ) उंदीरकानी.
**दन्तीपर्यायः** ( चक. १२.३ )
दन्तीचा प्रकार, दांतीचा प्रकार.
**द्रवन्ती** ( ध. १.२२९ ) द्रवन्ती, उंदीरकानी.

**प्रत्यक्ष**–न., **प्रमाण० मनसेन्द्रियैश्च चक्षुरादिभिर्यज्ज्ञानमुपलभ्यते तत्** ( चवि. ८.३९; सुसू. १.१६ ) **आत्मेन्द्रियमनोऽर्थानां सन्निकर्षात्तदात्वे या व्यक्ता बुद्धिः प्रवर्तते, सा प्रत्यक्षं निरुच्यते** (चसू. ११.२०) **इन्द्रियार्थसंनिकर्षजन्यं ज्ञानं प्रत्यक्षम्**, (तर्क०सं) **अक्षम् अक्षं प्रतीत्य उत्पद्यते इति प्रत्यक्षम् इति प्रशस्तपादः। तद्विषयाः–प्रत्यक्षप्रमाणेन ज्ञाता घटपटादयः** ( चसू. ११.७ )
प्रत्यक्ष म्हणजे आत्मा, मन, इंद्रिये यांचेकडून वस्तूचे जे ज्ञान होते ते. आत्मा इंद्रिये व मन यांच्या एकत्र येण्याने जे ज्ञान व्यक्त होते ते. इंद्रिय व अर्थ यांच्या साहचर्याने–संबंधाने होणारे ज्ञान. प्रत्येक इंद्रियाशी अक्षाशी–संबद्ध होऊन उत्पन्न होते ते.

**–लक्षणफल**–वि., **प्रत्यक्षार्हलक्षणफलवती (औषधिः)** ( सुसू. ४०.२० )
सफलता, जिचे गुणकर्मांचे कार्य अनुभवाला येते, प्रत्यक्ष दिसते ती.

**प्रत्यग्र**–वि., **नवम्** ( सुचि. २४.५; चचि. २८.१२९ )
नवीन.

**–धातु**–वि., **विशुद्धधातुः प्रत्यग्रत्वेन आप्यायितधातुः** ( सुचि. १५.३८; अहृसू. १६.४६; असंसू. २५.५)
विशुद्ध धातु, प्रसादरूप धातु, सारधातु. त्यामुळें पुष्ट झालेला धातु.

**प्रत्यङ्ग**–न., **अङ्गाऽवयवः** ( चशा. ७.११; सुचि. ३.२२; असंशा. ५.३ ) **अवयवं अवयवं प्रति योऽवयवः तत्प्रत्यङ्गमुच्यते** ( अरु. अहृशा. ३.१ ) **षट्पञ्चाशत्प्रत्यङ्गानि** ( चशा. ७.११ )
अंगाचे उपांग. अंगाचा अवयव, अवयवाचा अवयव. ५६ प्रत्यंगे आहेत.

**प्रत्यञ्जन**–न., **उपक्रम० पश्चात् प्रशान्तदोषे यदञ्जनं क्रियते तत्प्रत्यञ्जनम्, तीक्ष्णाञ्जनदुर्बलस्य नयनस्य प्रत्याश्वासनार्थम्, यथा–कांस्यमलादिप्रत्यञ्जनम्**, ( सुउ. १२.५०-५१; अहृसू. २३.३०½; असंसू. ३२.८) दोष शांत झाल्यावर जे अंजन केले जाते ते. जसे कास्याच्या मळाचे अंजन.

**प्रत्यनीक**–वि., **विरुद्धम्** ( सुसू. ४२.८ ) विरुद्ध.

**प्रत्यनुयोग**–पु., **तंत्रयुक्ति० उपप्रश्नः, 'नित्यः पुरुषः' इति प्रतिज्ञाते यत् परः 'को हेतुः' इत्याह, सोऽनुयोगः, अनुयोगस्यानुयोगः प्रत्यनुयोगः, यथा अस्यानुयोगस्य पुनः को हेतुरिति** ( चवि. ८.५३ )
उपप्रश्न. पुरुष नित्य आहे अशी प्रतिज्ञा केल्यावर दुसरा विचारतो कारण कोणते ? याला अनुयोग असे म्हणतात, पुन्हा त्या हेतूचे कोणते कारण ? असे विचारणे अनुयोगाचा अनुयोग म्हणजे प्रत्यनुयोग होय.

**प्रत्यय**–पु., **कारणम्** ( चशा. १.१०५ ) **निदानम्** ( चनि. १.३ ) कारण. निदानाचा पर्याय शब्द.
**पारदयोग० स्वर्णरजतताम्रस्रोतोऽञ्जनपारदगन्धकाभ्रकमेलनाज्जातोऽयम् उन्मादाऽपस्मारौ नाशयेत्** ( र. २३.२५-२६ )
पाऱ्याचा एक योग. सोने, रुपे, तांबे, सुरमा, पारा, गंधक, अभ्रक, एकत्र खलून हा योग तयार होतो. हा उन्माद, अपस्मार नाशक आहे.

**–भूत**–वि., **कारणभूतम्** ( चसू. ८.४ )
कारण झालेले.

**प्रत्यर**–न., **जन्मतः पञ्चमं नक्षत्रम्** ( असंनि. १.२१ )
जन्मनक्षत्रापासून दिननक्षत्रापर्यंतच्या संख्येला नवानी भागून बाकी ५ उरते असे दिननक्षत्र.

**प्रत्यर्थन**–( परिव० ) न., **अभ्यर्थना, याचना** ( सुउ. ६०.२४ ) याचना, प्रार्थना.

**प्रत्यवायकर**–वि., **ह्रासकरम्** ( चशा. ६.५ )
ऱ्हास करणारे.

**प्रत्यष्ठीला**–स्त्री., **रोग० नाभेरधस्ताज्जायमानः संचारी चलहीनो वा ग्रन्थिर्वाताष्ठीला सैव जठरे तिर्य-**

गुल्थिता वेदनायुक्ता वातविण्मूत्राण्यवरुणद्धि इति प्रत्यष्ठीला ( सुनि. १.९१; असंनि. ११.४९; र. १८.२०७-२०९ )
बेंबीच्या खाली स्थिर किंवा संचार करणारी जी गाठ ती वाताष्ठीला होय. तीच पोटात तिरकी निर्माण झाली की तिला प्रत्यष्ठीला म्हणतात. **लक्षणे**—वात, विष्ठा, व मूत्र यांचा अवरोध होतो व वेदना होतात.

**प्रत्याख्यान**–(परिव०) न. **परित्यागः, वर्जनम्** ( सुसू. २४.११ ) वर्ज केलेले, त्याग, सोडणे.

**प्रत्याख्येय**–वि., **असाध्यो रोगो रोगी वा** ( चचि. १३.७४; चवि. ८.३४ )
असाध्य रोगी, रोग. त्याज्य, सोडण्यास योग्य.

**प्रत्याख्येयता**–स्त्री., **असाध्यता** ( सुसू. ४.५ )
साध्य न होण्यासारखी स्थिति.

**प्रत्यागत**–वि., **बहिरागतम्** ( चसि. १.२३ )
बाहेर आलेले.
**व्याघुटितम्, पतितम्** ( ड. सुउ. ५४.२३ ) पडलेले.
**पुनः प्राप्तम्, पुनराविर्भूतम्** ( असंउ. १ )
परत मिळालेले, पुन्हा झालेले.

**प्रत्यातप**–अ., **आतपाभिमुखम्** ( **अत्र आतपाभिमुख्यमेव स्वारसिकोऽर्थः प्रत्येयः** ) ( सुचि. २४.९६ )
सूर्यतापाकडे केलेले. उन्हासमोर तोंड केलेले.

**प्रत्यादित्यम्**–अव्य., **आदित्याभिमुखम्** ( असंसू. ३६.११ ) सूर्याकडे तोंड करून ठेवलेले.
**–गुद**–वि., **प्रत्यादित्यम् आदित्याभि-(प्रत्यादित्य) मुख गुदं यस्य, तादृशः (आतुरः)** ( सुचि. ६.४ )
सूर्याकडे गुद केलेला रोगी.
**–मुख**–वि., **आदित्याभिमुखवंदनः** ( सुशा. ८.८ )
सूर्याकडे तोंड केलेला, सूर्याकडे तोंड करून वंदन करणारा.

**प्रत्याध्मान**–रोग० **तस्य लक्षणम्, आमाशयोत्थितमाध्मानमेव विमुक्तपार्श्वहृदयं कफव्याकुलितानिलं सत् प्रत्याध्मानं ज्ञेयम्** ( सुनि. १.८९ ) **तच्चिकित्साछर्दनमपतर्पणं दीपनानि च कर्तव्यानि** ( सुचि. ५.२६ ) पोट फुगणे.
लक्षण–कफाने रुद्ध झालेला वात आमाशयात विकृति करून पोट फुगवितो. ( हृदय व फासळ्या यांना विकृत न करिता. ) त्याला प्रत्याध्मान म्हणतात. त्यावर ओकारी करणारी किंवा दीपन पाचन औषधे द्यावी, व लंघन द्यावे.

**प्रत्यास्थापन**–न., उपक्रम० **आस्थापनं लक्ष्यीकृत्य दीयमानं बस्त्यौषधम्** ( चक्र. चसि. ८.१५ )
आस्थापन बस्तीचे औषध.

**प्रत्युत्पन्न**–वि., **तत्कालभवम्** ( असंसू. २२.११४ )
तात्काळ होणारे.
**–मति**–वि., **तदात्वे जायमाना अवस्थास्वपि अमुह्यमाना मतिर्बुद्धिर्यस्य, सः** ( **वैद्यः** ) ( सुसू. ३४.१९-२० )
प्रत्युत्पन्नमति. वेळेवर ज्याला योग्य ते सुचते तो. हजर जबाबी, समयसूचकता असलेला.

**प्रत्युत्सार**–पु., **तन्त्रयुक्ति० उत्सारो निवारणम्, प्रत्युत्सारः उपपत्त्या परमतनिवारणम्** ( चसि. १२.४५ )
सोपपत्तिक दुसऱ्याचे मत खंडण करणे.

**प्रत्युपस्थितमूत्र**–पु., **लक्षण० संजातमूत्रवेगः** ( ड. ) **एतादृशमूत्रविधारणान्मूत्राघातः । मूत्रविधारणपूर्वकं मिथुनप्रसङ्गान्मूत्रशुक्राख्यो व्याधिविशेषो जायते** ( सुउ. ५८.२० )
मूत्रवेग उत्पन्न झालेला. मूत्रविसर्जन न केले तर मूत्राघात होतो. विशेषेकरून मूत्रवेग उत्पन्न झाल्यावर संभोग केला तर मूत्रशुक्र नांवाचा विकार होतो.

**प्रत्युषस्**–न., **प्रभातम्** ( सुसू. ६.१४ ) पहाट.

**प्रत्येकमर्मनिर्देश**–पु., अध्यायसंज्ञा० ( सुशा. ६.१ )
अध्यायाचे नाव, यात प्रत्येक मर्म व त्याची माहिती आहे.

**प्रथम**–वि., **आदिमः** ( सुसू. ४४.३५ ) पहिला.
**–गर्भिणी**–वि., **या स्त्री प्रथमतो गर्भिणी, सा** ( का. रेवतीकल्प. ८ ) पहिल्यांदा गरोदर झालेली.
**–यवपत्रमुखी**–स्त्री., एषणीशस्त्र० ( सुसू. ८.११ )
**द्र० ' शस्त्र '** शस्त्रप्रकार.

**प्रदक्षिणाचारा**–वि., **अनुकूलाचारा प्रदक्षिणा दाक्षिण्येन नाम परच्छन्दानुवर्तनेन युक्ता आचारा यस्याः सा** ( चचि. ३.२६५ )
दुसऱ्याच्या इच्छा समजून वागणारी.

**प्रदक्षिणावर्ता**– वि., **दक्षिणदिक्का आवर्ता यस्याम् अथवा दक्षिणदिगभिमुखावर्तयुक्ता** ( **नाभिः** ) ( चशा. ८.५१ )
उजवीकडे वळण असलेली ( भोवरा असलेली ) बेंबी.

**प्रदक्षिणोदक**–वि., **प्रदक्षिणमिति परितः जलं यस्य सः** ( **देशः** ) ( चक. १.९ )
आजूबाजूला पाणी असलेला प्रदेश, ठिकाण.

**प्रदर**–पु., स्त्रीरोग० ( चसू. १.११९ ) **रक्तप्रदोषजरोगेष्वेकः** ( चसू. २८.११ ) **योनिगतस्रावस्वरूपः**

( चसू. १८.६ ) ' रजः प्रदीर्यते यस्मात् प्रदरस्तेन वै स्मृतः ' (चचि. ३०.२०९) **शुद्धार्तवस्य दुष्टार्तवस्य वाऽतिप्रमाणा प्रवृत्तिः** (सुशा. २.१८) **तस्य संप्राप्तिः–प्रकुपितो वायू रक्तं प्रमाणाधिकं कृत्वा गर्भाशयगता रजोवहाः सिराः समाश्रित्य रक्तमादाय तद्रजो यस्मादाशु विवर्धयति, रसभावात् तस्य प्रमाणाधिक्यं करोति, तं रोगं प्रदरमिति प्राहुः** ( चचि. ३०.२०६-८ ) **स चतुर्विधः वातपित्तकफसंनिपातभेदात्** (मा.) **तद्रूपाणि–सामान्यरूपाणि–सशूलः, साङ्गमर्दो रक्तातिस्रावः; तत्र वातजप्रदरे स्रुतमसृक् रूक्षारुणम्, फेनिलमल्पं, सशूलं, पिशितोदकाभम्** (मा.) **कटिवंक्षणहृत्पार्श्वपृष्ठश्रोणिपीडा** ( चचि. ३.२१२ ) **पित्तजे च सपीतनीलासितरक्तमुष्णं, भृशवेगि, पित्तार्तियुक्तम्; कफजलक्षणानि–आमं सपिच्छाप्रतिमं, सपाण्डु, पुलाकतोयप्रतिमम्; सांनिपातिकप्रदरलक्षणानि–सक्षौद्रसर्पिर्हरितालवर्णं, मज्जप्रकाशं, कुणपम्** (मा.) **तदुपद्रवाः–दौर्बल्यं, भ्रमो मूर्च्छा, मदस्तृषा, दाहः, प्रलापः, पाण्डुत्वं, तन्द्रा, वातरोगाश्च** ( सुशा. २.१९-२० ) **असाध्यलक्षणानि–अतिक्लिष्टायाः प्रक्षीणशोणिताया नार्याः सर्वहेतुसमाचारादतिवृद्धो वायुः प्रत्यनीकबलं, दुर्गन्धं, पिच्छिलं, पीतं, पित्ततेजोविदग्धं कफं रक्तमार्गेण सृजति । तथा च वसां मेदश्चाप्यपत्यमार्गेण सृजति । एवं सर्पिर्मज्जवसोपमं स्रावं स्रवन्त्यास्तृष्णादाहज्वरान्वितायाः, क्षीणरक्ताया दुर्बलायाश्चासाध्यः प्रदरः** ( चचि. ३०.२२१-२४ ) **तच्चिकित्सासूत्रम्–रक्तपित्तवद् अस्मिन् चिकित्सा कार्या** ( सुउ. ४५.४४ )

प्रदर म्हणजे धुपणी. एक स्त्रीरोग. रक्तदोषामुळे होणाऱ्या रोगापैकी एक. योनीतून स्राव होणे हे याचे स्वरूप. शुद्ध वा अशुद्ध आर्तवाचा अतिस्राव यात होतो. प्रदर रोगाची संप्राप्ति–प्रकुपित झालेला वायु रजाचे प्रमाणाधिक्य करून गर्भाशयगत रज वहाणाऱ्या सिरांच्या आधाराने रज घेऊन त्वरित आर्तवाचा म्हणजे रजाचा स्राव निर्माण करतो, त्यास प्रदर म्हणावे. प्रदराचे प्रकार– ( १ ) वातिक ( २ ) पैत्तिक ( ३ ) कफज ( ४ ) सान्निपातिक असे आहेत. सर्व अंग दुखणे आणि शूलयुक्त रक्तस्राव अतिशय होणे हे याचे सामान्य लक्षण. **वातज-प्रदरलक्षणे**— स्राव रुक्ष, तांबूस, फेसकट आणि थोडा थोडा व शूलयुक्त, मांस धुतलेल्या पाण्याच्या रंगाचा असतो; आणि कमर, जांघाडे, हृदय, बरगड्या, पाठ व कुल्ले या ठिकाणी पीडा होते. **पित्तज-प्रदरलक्षणे**— स्राव पिवळसर, निळसर, तांबूस, काळा असून उष्ण आणि जोरदार असतो. **कफज-प्रदरलक्षणे**— स्राव आमयुक्त, बुळबुळीत, खराब झालेले जव, गहू इ० धुताना होणाऱ्या पाण्याप्रमाणे पांढुरका असतो. **सान्निपातिक-प्रदरलक्षणे**— स्रावाचा वर्ण मध, आणि तूप मिश्र हरताळाच्य रंगाप्रमाणे असतो. मज्जेप्रमाणेही असतो. प्रेतासारखी दुर्गंधी असते. **प्रदराचे उपद्रव**— दौर्बल्य, भ्रम, मूर्च्छा, गुंगी, तहान, दाह, बडबड, पांढरेपणा, झापड आणि निरनिराळे वातरोग होतात. जी स्त्री अत्यंत पीडलेली, रक्तस्रावाने क्षीण झालेली असून प्रदराची सर्व कारणे रोगोत्पत्तीस घडलेली असतील तर त्यामुळे वायु प्रकुपित होऊन विरुद्ध शक्तीच्या दुर्गंधी बुळबुळीत पिवळ्या रंगाच्या विदग्ध पित्ताला व कफाला रजोमार्गात सोडतो आणि त्याच्याशी वसा व मेद यांचा संयोग करून त्या सर्वांसह सर्वलक्षणयुक्त स्राव योनिमार्गाने करतो. अशा प्रकारे तूप, मज्जा व वसा यांच्या सारखा स्राव होऊन तहान, दाह, ज्वर, रक्तक्षीणता व दुर्बलता असेल तर त्या स्त्रीचा प्रदर विकार असाध्य असतो.

**उपचार**— ह्या विकारात रक्तपित्त विकाराप्रमाणेच उपचार करावे.

**प्रदाक्षिण्य**–न., **आनुकूल्यम्** ( चसू. १५.७ ) अनुकूलता.

**प्रदिग्ध**–वि., **शूलिकाप्रोतमङ्गारपाचितम्** ( सुसू. ४६.३५६ ) सळईवर टोचून निखाऱ्यावर भाजलेले.

**अनुलिप्तः** ( अहसू. ३.११ ) लेप दिलेला.

**प्रदूषक**–वि., **विकृतिकारकः** ( असंशा. ६ ) विकृतिकारक.

**प्रदूषण**–वि., **प्रदूषयति विकृतिं जनयति इति प्रदूषणः विकृतिकारकः** ( अहसू. ६.११० ) विकृति निर्माण करणारा.

**प्रदेश**–पु., **स्थानम्** ( सुचि. २७.५ ) **एकदेशः** ( चक. १२.४९ ) प्रांत, एक भाग.

**तन्त्रयुक्ति० प्रकृतस्यातिक्रान्तेन साधनं प्रदेशो यथा ' देवदत्तस्यानेन शल्यमुद्धृतं तथा यज्ञदत्तस्याप्यय-**

मुद्धरिष्यति ' इति ( सुउ. ६५.१६ ) यद् बहुत्वादर्थस्य कार्त्स्न्येनाभिधातुमशक्यमेकदेशेनाभिधीयते ( चसि. १२.४२ )
दिसणाऱ्या कार्यावरून अन्य तत्समान कार्य होण्याची निश्चिति व्यक्त करणे म्हणजे प्रदेश. याने देवदत्ताचे शल्य काढले तसेच तो यज्ञदत्ताचेही शल्य काढील असे सुचवणे. जे पुष्कळ सांगण्यासारखे असते ते सर्व सांगणे अशक्य असते म्हणून त्यातला थोडा अंश सांगणे.

**प्रदेशिनी**–स्त्री., शारीर० प्रदेशनी ( सुचि. ३०.५; चचि. ३०.७३ ) तर्जनी. पहा 'प्रदेशनी'

**प्रदेह**–पु., लेपः ( चसू. ११.५५ ) प्रलेपः ( सुक. ५.३८ )
प्रदेहः सामान्येन बहलोऽबहलश्च लेप इति गृह्यते ( चक्र. चचि. ३.१७४ ) तस्य गुणाः– वातश्लेष्मप्रशमनः, संधानः, शोधनो रोपणः शोफवेदनापहश्च भवति ( सुसू. १८.६ ) शीत उष्णो बहलोऽबहुरविशोषी च, व्रणशोफे पीडनार्थमुपयुज्यमानः ( सुसू. १८.६ ) प्रदेहं रात्रौ न प्रयुञ्जीत । शैत्यपिहितस्योष्मणो बहिः निस्सरणाभावाद् विकारपरिवृद्धिः स्यात् ( असंउ. ३० ) द्र० ' लेप '
लेप. प्रलेप. जाड पातळ असा लेप. लेपाचे **गुण**– वातकफनाशक, तुटलेले जोडणारा, व्रणातील घाण काढणारा, व्रण भरून आणणारा, सूज आणि वेदना नाशक आहे. लेप रात्री लावू नये. थंडीने आत दबलेली उष्णता बाहेर निघून न गेल्याने विकार वाढतो. व्रणाच्या असलेल्या सुजेवर लेपाने पू दाबला जाऊन बाहेर पडावा म्हणून लेप लावला जातो.
पाकेन घनीभूतो रसः ( ड. सुउ. ४०.१४९ )
शिजवून घट्ट केलेला मांसरस.
**–स्वेद**–पु., प्रलेपस्वेदः ( कासू. २३.३४ )
लेपाने आलेला घाम.

**प्रदोष**–पु., रात्रिप्रथमप्रहरार्धम् ( ड. सुउ. ६४.१६; सुसू. ६.१४ ) अस्तमयादूर्ध्वं घटिकाद्वयं त्रयं वेति धर्मशास्त्रे; ' प्रदोषोऽस्तमयादूर्ध्वं घटिकाद्वयमिष्यते ' इति तिथ्यादितत्त्वम् ।
रात्रीचा पहिला अर्धा प्रहर सूर्याच्या अस्तानंतर दोन किंवा तीन घटिका, म्हणजे तास सव्वा तासाचा जो वेळ तो प्रदोष ( काळ ).

**प्रद्रव**–वि., प्रकृष्टद्रवम्, (ड.) यथा प्रद्रवं द्रव्यं यवागूयूषादि (सुउ. ४०.२७ ) कढण वगैरे पुष्कळ पातळ पदार्थ.

**प्रद्वेष**–पु., अप्रीतिः ( चनि. १.३३ )
न आवडणे, तिटकारा.

**प्रधमन**–न., धमनम् । उपक्रम० ( चनि. ७.८ ) नस्यभेदः, चूर्णस्य मुखेन नाड्या वा प्रध्मापनात् प्रधमनम् ( सुचि. ४०.२१ ) द्र० 'नस्य'
एक उपचार. सूक्ष्म चूर्ण तोंडाने अथवा नळीने नाकात फुंकणे.
**–नस्य**–न., उपक्रम० नस्यभेदः ( असंसू. २९ )
नस्याचा प्रकार.

**प्रधर्षण**–न., तिरस्कारः ( चसू. ११.३७ ) अनादर.

**प्रधान**–न., आत्मा ( चशा. ४.८; चशा. ७.१८ ) शरीरादि–प्रेरकं चेतनमित्यात्मा ( चशा. ७.१६ )
आत्मा. शरीरातील इंद्रियादींचा प्रेरक. चैतन्य.
प्रकृतिः, मूलप्रकृतिः ( ड. सुशा. १.८ ) मूलप्रकृति.
**–कर्मन्**–न., व्रणसम्बन्धिनी प्रधानचिकित्सा ( सुसू. ५.३ ) व्रणासंबंधी मुख्य चिकित्सा.
**–मर्मन्**–न., मर्म० हृदयम् (ड. सुचि. ३४.१९) हृदय.
**–संश्रय**–वि., प्रधानमात्मैव संश्रयः यस्य तादृशः नाम आत्मसंश्रितः ( भावः ) ( चशा. ४.१४ )
आत्म्यावर आश्रित असलेले.

**प्रध्यान**–न., प्रसंख्यानम्, प्रकृष्टं सञ्जातं वा ध्यानम् ( चसू. २४.३२ ) ध्यानस्थ.
**–शील**–वि., लक्षण० चिन्तापरः ( ड. सुउ. ४१.१८ )
काळजीत असणारा.

**प्रनष्टमेहन**–वि., अन्तराकृष्टलिङ्गः ( सुसू. ३२.४ )
जननेंद्रिय मुळाशी आकर्षित झालेला ( पुरुष ). हे मरणदर्शक चिन्ह आहे.

**प्रनष्टशल्यविज्ञानीय**–वि., अध्यायसंज्ञा० प्रनष्टशल्यविज्ञानमधिकृत्य कृतः ( सुसू. २६.१ )
अध्यायाचे नाव. शरीरात घुसून दिसेनासे झालेल्या शल्याची माहिती यात आहे.

**प्रनाडी**–स्त्री., नाडी, नलिका ( अहृसू. २०.१९ ) नळी.

**प्रपचन**–न., पाकः ( चवि. ८.३६ ) शिजवणे.

**प्रपथ्या**–स्त्री., वनस्पति० हरीतकी (ध. १.२०५) हिरडा.

**प्रपद**–न., शारीर० पादाग्रम् ( चसि. २.१६ ) तन्मानतः चतुरङ्गुलायतं पञ्चाङ्गुलविस्तृतं च(सुसू. ३५.१२)
पायाचा चवडा किंवा पंजा. हा चार अंगुळे लांब व पांच अंगुळे रुंद असतो.
**–शूल**–पु., लक्षण० प्रपदस्य शूलः ( चसि. २.१६ )
पायाच्या बोटांच्या भागातला शूल.

**–शोष**–पु., लक्षण० प्रपदस्य शुष्कता ( चसि. २.१६ ) पायाची बोटे सुकणे.

**–स्तम्भ**–पु., लक्षण० प्रपदस्य स्तम्भः ( चसि. २.१६ ) पायाची बोटे जखडणे.

**प्रपल्लव**–पु., वनस्पति० अशोकः (रा. १०.२७१) अशोक.

**प्रपाक**–पु., प्रथमपाकः 'चशब्द आदिकर्मणि' इति चक्रपाणिटीकानुसारेण पाकस्य प्राथम्यं ज्ञेयम् ( चचि. १५.९ ). अन्न घेताच तोंडातच होणारा पहिला पाक. पहिले पचन.

**प्रपाणि**–पु., शारीर० कफोण्यधस्तनः पञ्चदशाङ्गुलो हस्तभागः ( चवि. ८.११७ )
मनगट आणि कोपर यांचे मधील हाताचा भाग.

**प्रपाणिक**–पु., शारीर० प्रपाणिः ( असंशा. १०.१५ )
मनगट आणि कोपर यांचे मधला भाग.

**प्रपात**–पु., प्रकर्षेण पातः पतनम् अस्माज्जायते तादृशं गिरिकन्दरादिसम्बन्धि भ्रंशस्थानम् (चवि. ३.३६) निर्झरपतनम् ( सुचि. २४.९१ ) नदीतटादिः ( ड. सुक. ५.५५ )
डोंगरावरून खाली पडण्याचे स्थान. झऱ्याचे पाणी उंचावरून पडणे. नदीचा तट इत्यादी.

**प्रपान**–न., पानमेव पानक्रिया; ( चचि. २४.७५ ) पिणे. पिण्याची क्रिया.

**प्रपीडन**–न., उपक्रम० पीडनम् ( सुसू. ३७.११ )
चिकित्सेचा प्रकार. जोराने दाबणे.

**प्रपीत**–वि., भावितम् (सुउ. ५४.२९) भावना दिलेले.

**प्रपुण्डरीक**–न., वनस्पति० प्रपौण्डरीकम् अनेन त्रयोदशविषाणामन्यतमेन अक्ष्णो रक्तत्वमुदरे च वृद्धिर्जायते ( सुक. २.५,१६ )
कंदविष—तेरा विषांपैकी एक. डोळे लाल होणे व उदरवृद्धि हे याचे दुष्परिणाम होतात.

**प्रपुनाट**–पु., वनस्पति० चक्रमर्दः ( असंसू. ७.१३९-१४३ ) टाकळा.

**प्रपुनाड**–न., वनस्पति० शाकभेदः चक्रमर्दः (चसू. ३.१३; सुसू. ३९.३ ) टाकळा.

**प्रपुन्नाट**–पु., वनस्पति० चक्रमर्दः (ध. ४.४) टाकळा.

**प्रपुन्नाड**–पु., वनस्पति० चक्रमर्दः (ध. ४.५) टाकळा.

**प्रपूरण**–न., संभरणद्रव्यम् ( सुउ. २१.१३-१४ )
पूरण करणारे द्रव्य.

**प्रपौण्डरीक**–न., वनस्पति० पुण्डरीकम् (चसू. ३.२६) कमलभेदः ( चसू. ५.६४ ) तद्गुणाः–मधुरं, तिक्तं, कषायं, शीतं चक्षुष्यं, पित्तघ्नं, रक्तपित्तव्रणज्वरदाहतृषानाशकम् ( ध. ३.९२ ) रक्तपद्म.
कमळाचा प्रकार. **गुण**–मधुर, कडु, तुरट, शीत, डोळ्यांना हितकारक, पित्तशामक, रक्तपित्त, व्रण ज्वर, दाह, तहान नाशक.
कन्दविष० ( सुक. २.५-१६ ) द्र० 'कन्दविष' कन्दविष.
स्वनामख्यातं यष्टिमधुद्रव्यादीषत्स्थूलं मधुररसं नेत्राऽऽश्चोतनार्हं द्रव्यम् ( सुसू. ३८.३५ )
प्रपौण्डरीक आश्चोतन. जेष्टमधापेक्षा थोडे जाड गोड प्रपौंडरीक या नांवाचे द्रव्य, डोळ्याच्या विकारात धुण्यासाठी उपयोगी.
श्रीपुष्पम् (सुसू. ३८.३५) लवंग.

**प्रबन्ध**–पु., बन्धनम्, प्रकर्षेण गतिरोधः, (हाराणचन्द्रः) ( सुशा. १०.९ )
अडविलेला, बंधन. जोराने गति थांबलेला.

**प्रबला**–स्त्री., वनस्पति० प्रसारणी ( रा. ५.४३५ ) चांदवेल.

**प्रबाहु**–पु., शारीर० अंसादर्वाक्कफोणिपर्यन्तो भागः, अयं प्रमाणतः षोडशाङ्गुलः ( चवि. ८.११७ )
खांद्यापासून कोपरापर्यंतचा हाताचा भाग.

**प्रबोध**–पु., अर्थः प्रबुध्यते ज्ञायते इति प्रबोधः ज्ञेयार्थः ( सुउ. ६५.७ ) स्पष्टीकरण.

**प्रबाधनी**–स्त्री., वनस्पति० धन्वयासः ( रा. ३.२० ) धमासा.

**प्रभद्र**–पु., वनस्पति० निम्बः ( ध. १.२९ ) निम्ब.

**( प्रभद्रा )**–स्त्री., वनस्पति० प्रसारणी ( रा. ५.४३५ ) चांदवेल.

**प्रभव**–पु., आत्मा ( चशा. ४.८ ) आत्मा.
कारणम्, प्रभवति जायते अस्मात् इति प्रभवः कारणं हेतुर्वा ( चशा. १.३ ) कारण.

**प्रभा**–स्त्री., वर्णदीप्तिः, शरीरकान्तिस्तेजः, तस्याः संख्या–सा सप्तविधा–रक्ता, पीता, सिता, श्यावा, हरिता, पाण्डुराऽसितेति ( चइ. ७.१४-१५ )
प्रभा तु वर्णं प्रकाशयति परं विप्रकर्षाद् दूरत्वात् तेजः प्रभा एव इति लक्ष्यते ( असंशा. ९.८ )
वर्णाचे तेज, कांति. प्रभा ७ प्रकारची. ( १ ) रक्ता ( २ ) पीता ( ३ ) सिता (४) श्यामा (५ ) हरिता ( ६ ) पाण्डुरा ( ७) असिता. प्रभा वर्ण प्रकट करते. प्रभा दुरून दिसते.

–युक्ता–स्त्री., वनस्पति० बाकुची ( रा. ४.२२८ ) बावची.

–वती–स्त्री., पारदयोग० पारदसुवर्णाभ्रकहरितालतीक्ष्णलोहमाक्षिकादिसाधितेयम्–अपस्मारगुल्मशूलादिनाशिनी ( र. २१.१३९-४१ )
प्रभावती सिद्धौषध. पारा, सोने, अभ्रक, इत्यादीयुक्त औषधीयोग. अपस्मार, गुल्म, शूल इत्यादी नाशक.

–हानि–स्त्री., लक्षण० तेजोहानिः ( अहृसू. ११.१६ ) तेजनाश.

**प्रभाव**–पु., स्वभावः, सामर्थ्यम् ( चक. १.६ ) प्रकृष्टो भावः प्रभावः, शक्तिः ( चवि. १.४ ) ययोर्द्रव्ययोः रसवीर्यविपाकानां समानत्वमस्ति, कर्मणां च विशेषो लक्ष्यते तत्र विशेषकर्मकारी द्रव्यनिष्ठो धर्मः ( चसू. २६.६७ ) सर्वातिशायी द्रव्यस्वभावः ( असंसू. १७ )
सामर्थ्य, स्वभाव, द्रव्यस्वभाव. द्रव्यातील प्रभावी उत्कट भाव–शक्ति. ज्या दोन द्रव्यांचा रस वीर्य विपाक समान असून एकात विशेष कर्म दिसून येते, ते विशेषकर्म करणारा जो द्रव्यातला धर्म तो प्रभाव. द्रव्याचा सर्वश्रेष्ठ स्वभाव.

–तत्त्व–न., प्रभावनिर्णयः ( चवि. १.९ ) प्रभावाचा निर्णय, प्रभाव निश्चित समजणे.

**प्रभाषण**–( परिव० ) न., व्याख्यानम् ( सुसू. ४.३ ) व्याख्यान.

**प्रभाषणीय**–वि., अध्यायसंज्ञा० अधीतशास्त्रस्य पुनः अर्थतो व्याख्यानं प्रभाषणम्, तदधिकृत्य कृतोऽध्यायः ( सुसू. ४.१ )
अध्यायाचे नाव. पूर्वी सांगितलेल्या शास्त्राचे पुन्हा अर्थासह विवरण ज्यात आहे असला अध्याय.

**प्रभु**–पु., स्वामी, क्षेत्रज्ञः (सुशा.४.३६) मालक, आत्मा. खनिज० पारदः, (रा. १३.४१) पारा.

**प्रभूत**–वि., बहुलम्, भूरि, (सुचि. ३४.५) पुष्कळ.

**प्रभेद**–पु., भेदनवत्पीडा ( सुनि. १.२८ ) फोडल्यासारखी पीडा.

**प्रभ्रंशन**–(परिव०) न., अतीवप्रभ्रंशः, अत्यर्थमधःपतनम्, ( सुउ. २२.१३ )
अतिशय खाली पडणे, अतिशय गळणे.

**प्रमत्त**–वि., प्रकर्षेणोन्मत्तः अनवहितः, अदत्तचित्तः ( चवि. ३.३६ ) बेफाम, फार माजलेला.

**प्रमथ्या**–स्त्री., पाचनदीपनीयः कषायः (चचि. १९.१९)
'प्रमथ्या प्रोच्यते द्रव्यपलात् कल्कीकृताच्छृतात्। तोयेऽष्टगुणिते यस्याः पानमाहुः पलद्वयम्' (शार्ङ्गधर, अरु. अहृचि. ९.५.६-७ )
पाचन दीपन काढा. चार तोळे द्रव्य वाटून आठपट पाण्यात उकळून आठ तोळे शिल्लक काढा.

**प्रमदा**–स्त्री., विलासिनी स्त्री, प्रमदयति हर्षयति पुरुषमिति यद्वा प्रमदो हर्षोऽस्ति अस्या यौवनोत्साहजनित इति प्रमदा ( सुचि. २४.११६; अहृसू, ३.१५ )
स्त्री. पुरुषाला उपभोगाचा आनंद उत्पन्न करते ती. तारुण्यमदाने मुसमुसलेली.

**प्रमाण**–न., मानम् ( चशा. ७.१५ ) अंगुल्यादिभिरुत्सेधविस्तारायामदृष्ट्या यन्मीयते, तन्मानम् ( चवि. ८.११७ )
प्रमाण, मापन, अंगुळी इत्यादींनी लांबी रुंदी उंची इ० मोजणे.
परिमाणम् (सुचि. ३५.१ ) प्रमाण, माप, मापन. ज्ञानम्, प्रमीयते ज्ञायते इति प्रमाणं ( ज्ञानम् ) ( चवि. ८.७ ) कळणारे, समजणारे, ज्ञान.

**प्रमाथिन्**–वि., अनुलोमनम् ( चक्र. चसू. ७.९ ) क्षोभकारि, शीघ्रकार्यकारि ( चचि. १३.१८० )
'स्रोतांसि दोषलिप्तानि प्रमथ्य विवृणोति यत्। प्रविश्य सौक्ष्म्यात्तैक्ष्ण्याच्च तत्प्रमाथीति संज्ञितम् ॥' ( भाप्र. ) स्रोतोभ्यो दोषसंचयं निजवीर्येण निरस्यति, तत् ।
अनुलोमन, क्षोभकर, त्वरेने क्रिया करणारे. लिप्त झालेली स्रोतसे घुसळून जे रुंद करते आणि तेथे साठलेला पदार्थ स्रोतसाबाहेर काढते त्या क्रियेला प्रमाथी क्रिया म्हणावे. दोष मल आपल्या वीर्याने बाहेर नेणारे.

**प्रमादायतन**–वि., प्रमादोऽनवधानता आयतनमाश्रयस्थानं यस्य, तादृशः ( मदः ) ( असंनि. ६.५ )
उन्मत्ततेचे कारण. अपराधाचे कारण, अपराध ज्याचे आश्रयस्थान, तो–मद ( माज ).

**प्रमादिन्**–वि., प्रमादशीलः ( सुचि. ३०.४ )
अपराध करण्याचा स्वभाव असलेला.

**प्रमार्जन**–न., बालवस्त्रादिभिः प्रोञ्छनमनवबद्धशल्योद्धरणार्थं पञ्चदशोपायेष्वेकः ( सुसू. २७.४ ) पिचुकूर्चिकया कर्णप्रोञ्छनम् ( सुउ. २१.४१ )

प्रमार्जन. १५ उपायांपैकी एक. केस, कापड इत्यादींनी पुसणे. ढिले शल्य काढण्याकरिता उपयुक्त. कापसाचा बोळा, कुंचला यांनी कान पुसणे.

**प्रमिताशन**–न., अतीतकालभोजनं स्तोकभोजनं वा यच्च कर्शनीयानां श्रेष्ठम् ( चसू. २५.४० )
कमी खाणे, उशीरा भोजन करणे, शरीर कृश करण्याच्या कारणात श्रेष्ठ.

**प्रमीढ**–वि., प्रमेहरोगयुक्तः ( चसू. १३.३५ )
प्रमेह रोग असणारा.

**प्रमीलक**–पु., सततं प्रध्यानम् ( चसू. २३.७ )
सतत ध्यान चिंतन करणे.
लक्षण० स्तैमित्यम् ( असंउ. २७ )
ओले वस्त्र गुंडाळल्यासारखे वाटणे.

**प्रमूढता**–स्त्री., प्रकर्षेणाचैतन्यम् ( ड. सुक. २.१६ ) अतिशयेन विचेतनत्वम् ( ड. सुउ. ६१.७ )
मुळीच ज्ञान नसणे, अतिशय संज्ञानाश.

**प्रमृताशन**–न., क्षुत्तृष्णोपरमे जाते, शान्तेऽग्नौ यदशनं क्रियते तत् ( का.खिल. ५.६० )
अग्नि, भूक, तहान शांत झाल्यावर जे खाल्ले जाते ते.

**प्रमेय**–न., प्रमाविषयः, यथार्थज्ञानविषयः ( चशा. १.४५ )
योग्य ज्ञानासाठी मांडलेले सिद्धांत, ज्ञानाचा विषय, खऱ्या ज्ञानाचा विषय.

**प्रमेह**–पु., रोग० ( चनि. ४; चचि. ६; सुनि. ६; अहृनि. १० ) तस्योत्पत्तिः– पुरा दक्षाध्वरध्वंसे देहिनां हविष्प्राशात्प्रमेह उद्भूतः ( चनि. ८.११ ) स धातुक्षयजवातवृद्धिजो दोषावृतवातजश्चेति द्विविधः ( अहृनि. १०.१८-१९ ) तस्य स्वरूपम्–प्रभूताविलमूत्रता ( अहृनि. १०.७ ) तस्य संप्राप्तिः–नवान्नपानगुडवैकृताद्यपथ्यसेविनः अपरिपक्वा एव वातपित्तश्लेष्माणो यदा मेदसा सहैकत्वमुपेत्य मूत्रवाहिस्रोतांस्यनुसृत्याधो गत्वा बस्तेर्मुखमाश्रित्य निर्भिद्यन्ते, तदा प्रमेहान् जनयन्ति ( सुनि. ६.४ ) तस्य दूष्याः— रसासृङ्मांसमेदमज्जाशुक्राम्बुवसालसीकौजांसि त्रिदोषसहितानि त्रयोदश। तस्य मेहसंख्या विंशतिः– तत्र कफादुदकेक्षुवालिकासुरासिकताशनैर्लवणपिष्टसान्द्रशुक्रफेनमेहा दश; पित्तान्नीलहरिद्राम्लक्षारमञ्जिष्ठाशोणितमेहाः षट्; वातात्सर्पिर्वसाक्षौद्रहस्तिमेहाश्चत्वारः ( सुनि. ६.८) तस्य पूर्वरूपाणि– हस्तपादतलदाहः स्निग्धपिच्छिलगुरुता गात्राणां, मधुरशुक्लमूत्रता तन्द्रा सादः पिपासा दुर्गन्धश्च; श्वासतालुगलजिह्वादन्तेषु मलोत्पत्तिर्जटिलीभावः केशानां वृद्धिश्च नखानाम् ( सुनि. ६.५ ) तस्य लक्षणानि–तत्र कफजप्रमेहलक्षणानि– श्वेतमवेदनमुदकसदृशमुदकमेही मेहति; इक्षुरसतुल्यमिक्षुवालिकामेही; सुरामेही सुरातुल्यम्; सरुजं सिकतानुविद्धं सिकतामेही; शनैः सकफं मृत्स्नं शनैर्मेही; विशदं लवणतुल्यं लवणमेही; हृष्टरोमा पिष्टरसतुल्यं पिष्टमेही; आविलं सान्द्रं सान्द्रमेही; शुक्रतुल्यं शुक्रमेही; स्तोकं सफेनं फेनमेही मेहति। पित्तजमेहलक्षणानि–सफेनमच्छं नीलं नीलमेही मेहति; सदाहं हरिद्राभं हरिद्रामेही; अम्लरसगन्धमम्लमेही; सुतक्षारप्रतिमं क्षारमेही; मञ्जिष्ठोदकप्रकाशं मञ्जिष्ठामेही; शोणितप्रकाशं शोणितमेही मेहति। वातजप्रमेहलक्षणानि–सर्पिःप्रकाशं सर्पिर्मेही मेहति; वसाप्रकाशं वसामेही; क्षौद्ररसवर्णं क्षौद्रमेही; मत्तमातङ्गवदनुप्रबन्धं हस्तिमेही मेहति ( सुनि. ६.१०-१२ ) अष्टाङ्गहृदये चतुर्विधा भिन्नाः प्रमेहभेदा वर्णिताः; तत्र द्वौ कफजप्रमेहभेदौ–शीतमेही सुबहुशो मधुरं भृशशीतलम्; लालामेही लालातन्तुयुतं पिच्छिलं प्रमेहति । पित्तमेहभेदः–कालमेही मसीनिभं प्रमेहति । वातमेहभेदः–मज्जामेही मुहुर्मुहुर्मज्जाभं मज्जामिश्रं वा प्रमेहति (अहृनि. १०.१२-१४,१७) कफदोषजाऽऽलालमेहः–तन्तुबद्धमिवाऽऽलालं पिच्छिलं प्रमेहति । ( चनि. ४.१० ) कालेनाऽप्रतिकारिणः सर्वे एव प्रमेहा मधुमेहत्वमायान्ति ( सुनि. ६.२७ ) सतु कारणभेदेन द्विविधः–धातुक्षयजवातवृद्धिजो दोषाऽऽवृतवातजश्च ( अहृनि. १०.१८,१९ ) तस्योपद्रवाः–मक्षिकोपसर्पणमालस्यं मांसोपचयः प्रतिश्यायः शैथिल्याऽरोचकाविपाकाः कफप्रसेकच्छर्दिनिद्राकासश्वासाश्चेति श्लेष्मजानामुपद्रवाः; वृषणयोरवदरणं बस्तिभेदो मेढ्रतोदो हृदि शूलमम्लीकाज्वरातीसारारोचका वमथुः परिधूमायनं दाहो मूर्च्छा पिपासा निद्रानाशः पाण्डुरोगः पीतविण्मूत्रनेत्रत्वं चेति पैत्तिकानां, हृद्ग्रहो लौल्यमनिद्रा स्तम्भः कम्पः शूलं बद्धपुरीषत्वं चेति वातजानाम् ( सुनि. ६.१३ )

तस्य साध्याऽसाध्यत्वम्–दोषदूष्याणां समक्रियत्वात् कफजा दशमेहाः साध्याः; विषमक्रियत्वात्पित्तजाः

**षण्मेहा याप्याः; महात्ययिकत्वाद्वा वातजचतुर्मेहा असाध्यतमाः** ( सुनि. ६.८ ) **प्रमेहे तुल्यदूष्यता सुखसाध्यस्य हेतुः** (असंसू. ७.२४९) **सर्वे मधुमेहा असाध्याः** ( सुनि. ६.२७ ) **उपद्रवाविष्टमतिप्रस्तुतं पिडकापीडितं मानवं गाढः प्रमेहो हन्ति** ( सुसू. ३३.८ ) **बीजदोषजकुलजविकारोऽसाध्यः** ( चचि. ६.५७ ) **चिकित्सासूत्रम्–रूक्षं गाढमुद्वर्तनं व्यायामो रात्रिजागरादयः इत्येवमादिकां कफमेदोहरां चिकित्सां कुर्यात्** ( अहृचि. १२.३३ ) **न चैतान्कथंचिदपि स्वेदयेन्मेदोबहुत्वादेतेषां विशीर्यंते देहः स्वेदेन** ( सुचि. १२.७ ) **प्रमेहनिवृत्तिलक्षणम्–यदा प्रमेहिणो मूत्रं पिच्छारहितं प्रसन्नं रूक्षं भवति यदा च मूत्रस्य रसौ कटुतिक्तौ भवतः, तदा तस्य प्रमेहरोगो निवृत्त इति जानीयात्** (सुचि. १२.२० ) **प्रमेहेऽरिष्टलक्षणानि–स्वप्ने चण्डालैः सह स्नेहपानं कुर्वाणः स्नातानुलिप्तः सन् मक्षिकाभिः गृध्यमानो नरः प्रमेहेण स्पृष्टो मरणाय कल्पते** ( चइ. ५.१७; असंशा. १२ )

ज्या विकारामध्ये लघ्वी प्रमाणाने अधिक होते आणि गढूळ असते त्या विकारास प्रमेह म्हणतात. या विकाराचे २० प्रकार आहेत. कफामुळे होणारे १० प्रकारचे प्रमेह आहेत. पित्तामुळे होणारे ६ प्रकारचे मेह आहेत आणि वायूमुळे होणारे ४ प्रकारचे मेह आहेत. त्यांची नावे क्रमाने (१) उदकमेह (२) इक्षुवालिकामेह (३) सुरामेह (४) सिकतामेह (५) शनैर्मेह (६) लवणमेह (७) पिष्टमेह (८) सान्द्रमेह (९) शुक्रमेह (१०) फेनमेह (११) नीलमेह (१२) हरिद्रामेह (१३) अम्लमेह (१४) क्षारमेह (१५) मंजिष्ठामेह (१६) शोणितमेह (१७) सर्पिर्मेह (१८) वसामेह (१९) क्षौद्रमेह (२०) हस्तिमेह.

प्रमेहसंप्राप्ति—नवे धान्य, नवे पाणी, गुळाचे केलेले निरनिराळे मधुर, पिठूळ पदार्थ, इत्यादींच्या अपचनाने, बैठकीचे, झोपेचे सुख अतीशय उपभोगल्याने तसेच त्रिदोषकारक व विशेषतः कफवर्धक व मेदाची वृद्धि करणारी अनेक कारणे घडल्यामुळे शरीरातील कफप्रधानत्रिदोष बिघडतात, मेदधातूला बिघडवून मूत्रवह स्रोतसांवर आघात करून बस्तीद्वारे शरीराबाहेर मूत्रासह बाहेर पडतात. या मूत्रातून वर सांगितलेले २० प्रकारचे घटक जातात यास प्रमेह किंवा मधुमेह सुद्धा म्हणतात. या विकारातील दूष्ये–रस, रक्त, मांस, मेद, मज्जा, शुक्र, अंबु, वसा, लसीका आणि ओज. प्रमेह फार जुना झाला की, त्याचे मधुमेहात रूपांतर होते.

प्रमेहाचे उपद्रव—अंगावर माशा भुळभुळल्याप्रमाणे वाटते, आळस, मांसल भागांची वाढ, पडसे, शैथिल्य, चव नाहीशी होणे, पचन बंद होणे, तोंडातून कफस्राव, ओकारी, झोप, कास, श्वास हे कफप्रधान प्रमेहाचे उपद्रव आहेत. तसेच वृषणकंडू व कातडीला चिरण्या पडणे, मूत्राशयामध्ये फुटल्याप्रमाणे पीडा होते, शिश्नात टोचल्यासारखी वेदना उत्पन्न होणे, हृदयामध्ये शूल, घशाशी आंबट येणे, ज्वर, अतीसार, ओकारी, दाह, मूर्च्छा, तहान, निद्रानाश, पांडुरोग, विष्ठा, मूत्र आणि नेत्र पिवळसर दिसतात. हे उपद्रव पित्तज प्रमेहात होतात.

हृदय जखडणे, हावरेपणा, झोप नसणे, अंग ताठ होणे, कंप, शूल, तीव्र मलावरोध हे वातज प्रमेहाचे उपद्रव होत.

प्रमेहाची साध्य-असाध्यता—दोष आणि दूष्य (कफ दोष–मेद दूष्य) हे समानधर्मी असल्यामुळे त्यांच्यावर कफमेदनाशक चिकित्सा उत्तम लागू पडते, म्हणून कफप्रधान १० प्रमेह साध्य आहेत. विषम क्रियेमुळे पित्ताचे ६ प्रमेह हे औषध आणि पथ्य चालू आहेत तोपर्यंत बरे असतात ( पित्तप्रधान प्रमेहावर पित्तशामक थंड, मधुरादि औषधे तीं पित्तशमन करतात, पण मेद, मांस, क्लेद, रस, रक्त, शुक्र, मूत्र यांची वाढ करतात. मेद, मांस क्लेदादिकांची औषधे म्हणजे तिखट, उष्ण, तीक्ष्ण औषधे याने पित्ताची वाढ होते. यामुळे या चिकित्सेला विषम क्रिया म्हटले आहे. ) आणि वातादि ४ ही मेह असाध्य आहेत. कारण हा विकार उत्पन्न होतानाच मज्जा, शुक्र इत्यादी धातूंचा नाशच होत असल्यामुळे ते धातु परत निर्माण करणेच कठीण असल्यामुळे या विकारात साध्यता नाही. त्याचप्रमाणे बीजदोषज आणि वडिलांच्या दोषाने आलेले ( कुलज ) प्रमेह असाध्य असतात.

चिकित्सासूत्र—रूक्ष पदार्थांचा आहार विहार, व्यायाम, रात्री जागरण, आणि कफमेदोनाशक उटणी लावणे इ० सर्व चिकित्सा प्रमेहात करावी. मात्र शेक करू नये. शेक केल्यास मेदोदोषामुळे देह विशीर्ण होतो.

प्रमेह बरे झाल्याचे चिन्ह—ज्याचे मूत्र बुळबुळीत नाही, योग्य वेळी, योग्य प्रमाणाने होत आहे, लघ्वी झाल्याचे समाधान होत आहे; मूत्र तिखट कडवट आहे, अशा रोग्याचे हे प्रमेह बरे झाले समजावे. मरणसूचक चिन्हे—प्रमेहरोगात आपण चांडाळ लोकांसह तेल तूप पितो आहो, असे रोग्याला स्वप्नात दिसणे, स्नान केल्यावर सुद्धां ज्या प्रमेही रोग्याच्या अंगावर माशा फार बसतात तो रोगी मरतो.

**–गजसिंह**–पु., पारदयोग० **पारदे हेमपूतिलोहादि-साधितोऽयं प्रमेहनाशकः** ( र. १७.४१-४२ )
प्रमेहगजसिंह नावाचे औषध, पारा सोने इत्यादि युक्त योग प्रमेहनाशक.

**–चिकित्सित**–न., अध्यायसंज्ञा० ( चचि. ६.१; सुचि. ११.१ )
अध्यायाचे नांव. यात प्रमेहाचे उपचार आहेत.

**–निदान**–न., अध्यायसंज्ञा० ( चनि. ४.१; सुनि. ६.१ )
अध्यायाचे नाव. यात प्रमेहाची माहिती आहे.

**–पिटिका**–स्त्री., रोग० ( चसू. १७; सुचि. १२; सुनि. ६; असंनि. १०; अहृनि. १० )
**रसायनीनां दौर्बल्यान्नोर्ध्वमुत्तिष्ठन्ति प्रमेहिणां दोषास्ततो मधुमेहिनामधःकाये पिडकाः प्रादुर्भवन्ति** ( सुचि. १२.८ ) **प्रमेहेण विनाऽप्येता दुष्टमेदसो जायन्ते। यावद्वस्तुपरिग्रहस्तावन्नोपलक्ष्यन्ते एताः** ( असंनि. १०.५० ) **तत्र वसामेदोभ्यामभिपन्नशरीरस्य त्रिभिर्दोषैश्चानुगतधातोः प्रमेहिणो दश पिडका जायन्ते। तद्यथा–शराविका, सर्षपिका, कच्छपिका, जालिनी, विनता, पुत्रिणी, मसूरिकाऽलजी, विदारिका, विद्रधिका; ताश्च शरावमात्रा तद्रूपा निम्नमध्या शराविका, गौरसर्षपसंस्थाना तत्प्रमाणा सार्षपी, सदाहा कूर्मसंस्थाना कच्छपिका, तीव्रदाहा मांसजालसमावृता जालिनी, महती नीला विनता, महत्यल्पाचिता, पुत्रिणी, मसूरसमसंस्थाना मसूरिका, रक्तासिता स्फोटवती दारुणाऽलजी, विदारीकन्दवद्वृत्ता कठिना विदारिका, विद्रधेर्लक्षणैर्युक्ता विद्रधिका; तस्याः साध्यासाध्यत्वम्–गुदे, हृदि, शिरस्यंसे, पृष्ठे, मर्मणि चोत्थिताः सोपद्रवा दुर्बलाग्नेः पिडकाः परिवर्जयेत्** ( सुनि. ६.१४-२० ) **शराविकाद्या नव पिडकाः प्रागुक्ताः, ताः प्राणवतोऽल्पास्त्वङ्मांसप्राप्ता मृद्व्योऽल्परुजः क्षिप्रपाकभेदिन्यश्च साध्याः** ( सुचि. १२.३ ) **चिकित्सासूत्रम्–अपक्कानां पिडकानां शोफवत् प्रतीकारः पक्कानां तु व्रणवत्प्रतीकारो विधातव्यः, प्रमेहचिकित्सितेनैव एतासां पिडकानां शमः सिध्यति। तत्र पूर्वरूपेषु अपतर्पणं वस्तमूत्रं वनस्पतिकषायश्चोपदिष्टः** ( सुचि. १२.४ )
फोड, पुळी, पुटकुळी. प्रमेह झालेल्या माणसाला किंवा ज्यांचे शरीर स्थूल आहे अशांना हा विकार होतो. शरीरातील रसायनी ज्यांच्या दुर्बल आहेत अशांना प्रकुपित दोषामुळे शरीरावर या पुळ्या होतात. प्रमेहावाचून मेह दुष्ट होणाऱ्यांनाही या होतात. त्या ( १ ) शराविका ( २ ) सर्षपिका ( ३ ) कच्छपिका ( ४ ) जालिनी ( ५ ) विनता ( ६ ) पुत्रिणी ( ७ ) मसूरिका ( ८ ) अलजी ( ९ ) विदारिका ( १० ) विद्रधिका या नावांनी ओळखल्या जातात. त्यांची नावे त्यांच्या स्वरूपावरून ठरविलेली आहेत. बलवानास झालेल्या, त्वचा व मांस यांतील लहान मऊ थोडी वेदना असलेल्या लवकर पिकून फुटणाऱ्या साध्य असतात. त्यांची चिकित्सा–अपक्व पुळ्यांची चिकित्सा सुजेप्रमाणे करावी. प्रमेहाची चिकित्सा चालू ठेवावीच. पिकलेल्या पुळ्या व्रणाप्रमाणे उपचाराव्यात.

**पिडकाचिकित्सित**–न., अध्यायसंज्ञा० (सुचि. १२.१)
अध्यायाचे नाव.
प्रमेहाच्या पुळ्यांचे उपचार यात सांगितले आहेत.

**प्रमोद**–पु., धान्य० **शालिभेदः** द्र० ' शालि '
( अहृसू. ६.२ ) प्रमोद नावाची साठेसाळी.

**प्रमोदक**–पु., धान्य० **शालिभेदः** द्र० ' शालि '
( चनि. ४.५ ) **सर्वप्राणिनां पथ्यः** ( सुसू. २०.५ )
साठे साळीचे नाव. ही सर्वांना पथ्यकर.
**षष्टिकभेदः** ( सुसू. ४६.८ ) साठेसाळीचा प्रकार.

**प्रमोदिनी**–स्त्री., वनस्पति० **मल्लिका** ( ध. ५.१३४ )
मोगरी, मेंदी.

**प्रमोह**–पु., लक्षण० **चित्तनाशः विचेतस्त्वम्** ( चसू. १७.३१ )
वस्तूच्या ज्ञानाबद्दल अज्ञान, चित्ताचा नाश, मूर्च्छा.

**प्रमोहक**–पु., **मूर्च्छा, मोहः, इन्द्रियापटुत्वम्** ( चक्र. चसू. २.६ )
मूर्च्छा; विचारशक्ति कुंठित होणे. इंद्रिये अक्षम होणे.

**प्रयत**–वि., **पवित्रम्** ( चइ. १२.१० ) पवित्र.
**प्रयोगज्ञो** ( **वैद्यः** ) ( सुउ. २०.१६ )
प्रयोग जाणणारा वैद्य.

**प्रयतन**–( परिव० ) न., **प्रयत्नः** ( सुचि. ७.३२ ) प्रयत्न.

**प्रयत्न**–पु., **कार्यारम्भेषूत्साहः** ( ड. ) **प्रेरणा** ( सुशा. १.१७ ) **प्रयतनम्** ( चसू. १.४९ )
प्रेरणा, कार्यारंभाबद्दल उत्साह, प्रयत्न.
**आत्मन आद्यं कर्म, आत्मनिष्ठो विशेषगुणः** ( चसू. १.४९ )
आपले प्रथम कर्तव्य-कर्म. आत्म्याच्या ठिकाणचा विशेष गुण.

**प्रयाण**–न., **गमनम्** ( असंशा. १२.३ ) जाणे.

**प्रयोक्तृ**–पु., **शरीरादिप्रेरकं चेतनम्, प्रधानम्, आत्मा** ( चशा. ७.१६ )
शरीराची प्रेरकशक्ति. शरीरातील प्रमुख, प्रधान, आत्मा.

**प्रयोग**–पु., **भेषजस्य योजना** ( चनि. ८.२३ ) **द्रव्याणां कालप्रकृत्याद्यपेक्षा योजना** ( चसू. ४.२९ ) **चिकित्सादि कर्म** ( सुउ. ६०.५४ )
औषधयोजना. औषधांची काल प्रकृति इत्यादींना अनुसरून योजना, उपचार इत्यादि कर्मे.
**अभ्यासः** ( चक्र. चचि. २९.८३ )
अभ्यास. पुनः पुनः केलेला प्रयोग.
**शब्दयोजना, शब्दप्रयोगः** ( चवि. ६.४ )
शब्दांची योजना. शब्दप्रयोग.

**–धूम**–पु., **उपक्रम० धूमपानभेदः, प्रायोगिकधूमः,** ( चसू. ५.३७ ) **द्र० 'धूमपान'**
प्रायोगिक धूम्रपान. धूम्रपानाचा प्रकार.

**–पान**–न., **प्रायोगिकं धूमपानम्** ( चसू. ५.३३ ) **द्र० 'धूमपान'** धूम्रपान. एक प्रकारचे धूम्रपान.

**–समसाद्गुण्य**–न., **समस्य समीचीनस्य प्रयोगस्य सद्गुणत्वम्, समेऽल्पकाले अल्पमात्रे च पिप्पल्यादि-प्रयोगे सद्गुणा भवन्ति** ( चवि. १.१६ )
योग्य वेळी योग्य प्रकारे केलेल्या प्रयोगाची अपेक्षित फलप्राप्ति होणे. उदाहरणार्थ, दूष्यदेशादींना अनुसरून पिंपळी इत्यादी रसायन औषधाच्या योग्य रीतीने केलेल्या प्रयोगाची गुणवत्ता. साधारण ऋतूत थोड्या कालात थोड्या प्रमाणाने दिलेल्या पिंपळी इत्यादींच्या प्रयोगाने लाभ होतो.

**–सौष्ठव**–न., **योजनासुष्ठुत्वम् भेषजोपयोगस्य समीचीनत्वम्** ( चसू. १५.५ )
प्रयोगाचे श्रेष्ठत्व, चांगुलपणा, प्रयोगाचे निर्दोषत्व.

**प्रयोजन**–न., **यदर्थमारभ्यते तत्** ( चवि. ८.४४ ) **यमर्थमभीप्सन् जिहासन्वा कर्म आरभते, तेन अनेन सर्वे प्राणिनः सर्वाणि कर्माणि सर्वा विद्याश्च व्याप्ताः** ( १।१।१ न्यायभाष्यम् )
हेतु. ज्याकरिता केले जाते ते. जे उद्दिष्ट पुढे ठेवून कर्म आरंभिले जाते ते उद्दिष्ट. त्याने सर्व प्राणी, सर्व कर्मे, सर्व विद्या व्यापल्या आहेत.
**तन्त्रयुक्ति० यदर्थं कामयमानः प्रवर्तते** ( चसि. १२.४२ ) एक तंत्रयुक्ति, ज्याकरिता इच्छुक प्रवृत्त होतो तो.

**प्ररोह**–पु., **वृक्षाङ्गभेदः अङ्कुरः** ( चसू. १.७४ ) अंकुर.
**शाखाऽधोभागनिःसृतजटा** ( ड. सुउ. ४०.८८ )
शाखेपासून निघून खाली जाणाऱ्या जटा, मुळ्या ( पारंब्या ).

**–वती**–वि., **बीजाङ्कुरजननी** ( सुसू. ३६.३ )
बीज अंकुर देणारी. बीजांकुर असलेली. बीजांकुर निर्माण करणारी.

**प्रलपन**–न., **लक्षण० संगतिशून्यवचः, वातप्रकोपेण जायमानो विकारः** ( र. १२.९९-१०० )
असंबद्ध बडबड. संगतिविरहित बोलणे. विसंगत भाषण. वातप्रकोपाने होणारा विकार.

**प्रलम्ब**–पु., **वनस्पति० भूस्तृणः** (ध. ४.४७)
भूस्तृण, लतांकुर, रोहिस गवत.

**प्रलय**–पु., **नाशः** ( चनि. ३.७ ) **मरणम्** (चशा. १.३८)
मरण, नाश.
**महाप्रलयः** ( चशा. ४.८ ) जगाचा नाश.

**–काल**–पु., **मृत्युकालः** (सुशा. ४.३३) मृत्यूचा काल.

**–हेतु**–पु., **प्रलयस्य कारणम्, मरणहेतुः** ( चसू. २४.५३ ) प्रलयाचे कारण. मरणाचा हेतु.

**प्रलाप**–पु., **लक्षण० संगतिहीनं निरर्थकं वा भाषणम्** ( चनि. १.३३; सुसू. ४६.५०४ )
असंबद्ध बडबड. विसंगत बोलणे, निरर्थक भाषण.

**प्रलापक**–पु., **रोग० संनिपातज्वरभेदः** ( मा. ज्वर.२१ ) **लक्षणम्–कम्पप्रलापपरितापनशीर्षपीडाप्रौढप्रभावपवमानपरः प्रज्ञाप्रणाशविकलः प्रचुरप्रवादः प्रलापी क्षिप्रं प्रयाति** ( अश्विनीसंहिता, मा. ज्वर. २१ )
**द्र० ' ज्वर '** सन्निपातज्वराचे प्रकार.

प्रलापक ज्वराची **लक्षणे**—कंप, बडबड, शरीर तापणे, डोकेदुखी, प्रौढप्रभाव, प्रज्ञेचा नाश, तापाचा वेग भरभर वाढणे.

**प्रलापिन्**–वि., **लक्षण० वाचालः प्रलपनशीलः, असंबद्धभाषी** ( सुशा. २.२५ )
वाचाळ, असंबद्ध बडबडणारा.

**प्रलीयमान**–वि., **क्षीयमाणः** ( सुशा. १०.५७ )
क्षीण झालेला.

**प्रलुठित**–वि., **वेल्लितः, उपावृत्तः, लुठितः** ( असंशा. ६.६९ )
वेलीसारखे, ( अञ्जनलिकेला ) चिकटलेले, लपेटलेले.

**प्रलून**–पु., **कफजकृमि० दर्भपुष्पमहापुष्पादीनां कफकोपसमुद्भवानां षण्णां कृमीणामेकतमोऽयम्** ( सुउ. ५४.१२ ) **द्र० ' कृमि '**
कृमीचा प्रकार. दर्भपुष्प, महापुष्प इत्यादी कफदुष्टीने होणाऱ्या सहा कृमींपैकी एक.
वि., **उद्धूतः, छिन्नः** ( असंउ. २५ ) नाश पावलेला.

**प्रलेप**–पु., **उपक्रम० लेपः द्र० ' लेप '** ( चसू. १८.५; चचि. २१.९८-१०७ ) लेप.

**–विधि**– पु., **लेपविधिः, द्र० ' लेप '** ( चचि. २१.९८-१०७ ) लेपाचा विधी.

**प्रलेपक**–पु., **रोग० ज्वरभेदः द्र० ' ज्वर '** ( सुउ. ३९.५४ ) **तल्लक्षणम्–घर्मेण गौरवेण च गात्राणि प्रलिम्पन्निव तथा मन्दज्वरविलेपीशीतयुक्तश्च** ( मानि. ) ज्वराचा प्रकार.
**लक्षण**– मंद ज्वर, घामाने अवयव लपेटलेले व जड झालेले व थंडावा असलेले.

**प्रवण**–वि., **उन्मुखम्** ( चक. १.५ ) सामोरा गेलेला.

**प्रवर**–पु., **प्रतिवादिनां मध्ये श्रेष्ठः, प्रतिवादी** ( चवि. ८.१९ )
उत्कृष्ट. प्रतिवाद्यांमध्ये श्रेष्ठ. प्रतिवादी.
न., **वनस्पति० अगरु** ( कासिद्धि. ४.; ध. ३.२५ ) अगरू.

**–सत्व**–वि., **श्रेष्ठबलः सत्वसारः (पुरुषः)** ( चवि. ८.१२१ ) **द्र० ' सत्वसार '**
श्रेष्ठ पुरुष. उत्तम सत्वसार, बलवान मनाचा, उत्तम बलाचा.

**प्रवर्तन**–न., **प्रवृत्तिः, प्रादुर्भावः** ( चसू. १.१३६ )
प्रवृत्ति, प्रादुर्भाव.

**प्रवात**–पु., न., **प्रकृष्टवातः, प्रबलवायुः** (सुचि. २४.८४)
जोराचा वारा. जोराने वहाणारा वारा.

**–स्थापन**–न., **वातबहुलदेशे संस्थापनम्** ( सुसू. ४५.१९ )
ज्या ठिकाणी वायु फार आहे अशा ठिकाणी स्थापना करणे. वाहात्या वाऱ्यात ठेवणे.

**प्रवाद**–पु., **छद्मवचनम्** ( सुउ. ४१.३६ )
मूळचे नाव बदलून दुसरे सांगणे. कावळ्याचे मांस तित्तिराचे सांगणे. मूळ नाव लपविणे.

**प्रवाल**–पु., न., **वृक्षाङ्ग० अङ्कुरः, पल्लवः** ( असंक. )
कोवळ्या डिऱ्या. अंकुर.
**भैषज्य० विद्रुमः, सामुद्रः, तद्गुणाः—मधुरोऽम्लः, शीतः, सरो वीर्यकरः, कान्तिकरस्त्रिदोषघ्नो विषदृष्टिदोषनाशकः** ( ध. ६.६४ ) **श्रेष्ठप्रवालगुणाः—पक्वबिम्बफलवद्रक्तवर्णो गोलाकारो लम्बायमानो वक्रतारहितः, स्निग्धोऽव्रणकः स्थूलः** ( र. ४.१९ ) **निकृष्टप्रवालगुणाः–श्वेत ईषत्पाण्डुरल्पाकारः सव्रणो महाच्छिद्रयुक्तो निर्भारः, शुभ्रवर्णः** ( र. ४.२० ) **कफमूत्रकृच्छ्रघ्नः** ( चचि. २६.५६ ) **गव्यमूत्रेण सह आसेवितोऽयं पाण्डुरोगघ्नः** ( सुउ. ४४.२१ ) **विसर्पे प्रदेहार्थमुपयुज्यते** ( चचि. २१.८२ ) **इन्द्रोक्तरसायने , ब्राह्मरसायने चोपयुक्तः** ( चचि. १(४).२२; चचि. १.५८ )
प्रवाळ म्हणजे पोवळे. त्याचे **गुण**–मधुर, आंबट, थंड, सर, शुक्रवर्धक, कान्तिवर्धक, व त्रिदोषनाशक, विषनाशक, दृष्टिदोषनाशक. कफज मूत्रकृच्छ्रविकार नाहीसे करते. गाईच्या मूत्राबरोबर घेतल्यास पांडुरोगघ्न. धावऱ्यावर लेप उपयुक्त. इंद्रोक्त रसायन व ब्राह्म रसायनात उपयुक्त. श्रेष्ठ प्रवाळाचे स्वरूप— पिकलेल्या तोंडल्याच्या फळाप्रमाणे लाल वर्णाचे, गोलाकार, लांबट, सरळ, स्निग्ध, छिद्र नसलेले, जाड असे असते. निकृष्ट प्रवाळ पांढरे, हलके, लहान मोठ्या खड्डयांनी, भोकांनी युक्त असते.

**–गुटिकाभासा**–वि., **लक्षण० प्रवालकृतगुटिकावद् आभासमाना ( मसूरिका )** ( चइ. ११.१४ )
प्रवाळाच्या गोळीप्रमाणे लाल दिसणारी, मसूराच्या आकाराची पुळी.

**–गुलिकाभासा**–वि., **लक्षण० प्रवालकृतगुटिकावद् आभासमाना ( मसूरिका )** ( असंशा. ११.४४ )
प्रवाळाच्या गोळीप्रमाणे लाल दिसणारी मसूराच्या आकाराची पुळी.

**प्रवालक**–न., **भैषज्य० प्रवालम्** ( र. ४.३ ) प्रवाळ.

**प्रवासिनी**–स्त्री.,धान्य० व्रीहिः ( रा. १६.१०९ )
तांदळाचा एक प्रकार.

**प्रवाह**–पु., **प्रवाहणम्, निकुहनम्** ( ड. सुउ. ५८.१२ )
कुंथणे.
**रोग० प्रवाहिका** ( सुचि. ३७.६६ )
रोगाचे नाव, आवरक्ताची हगवण.

**प्रवाहण**–न., **कृच्छ्रात् पुरीषादिवेगजननम्** (चचि.१५.४६)
**प्रकर्षेण निर्वाहणम्** ( सुनि. १३.६१ )
**निकुन्थनम्, कुन्थनम्** ( सुसू. २२.८ )
कुंथणे, कुंथून कष्टाने मळाचा वेग येणे, मळाचा वेग येताना पीडा असल्याने कुंथावे लागणे.
**लक्षण० अतिसरणम्** (सुउ. ४०.१०८) **प्रवर्तनम्** ( ड. सुचि. ३७.९३ )
अतिसाराची प्रवृत्ती. मळाची अतिप्रवृत्ती.

**( प्रवाहणी )**–स्त्री., शारीर० **गुदवलीत्रयेष्वेका प्रवाहणी, प्रवाहयतीति प्रवाहणी** ( ड. सुनि. २.५ )
गुदामधील एक वळी.

**प्रवाहिका**–स्त्री., **रोग०** ( चचि. १९.३०; सुउ. ४०; असंसू. ६; अहनि. ८) तस्याः संप्राप्तिः– **अहिताशनस्य नरस्य प्रवृद्धवायुर्निचितं बलासं बहुशः प्रवाहयन्नल्पं मलार्कं च तम् अधस्ताक्षुदन् गुदेनप ातयति । स रोगः प्रवाहिकेति ख्यातः** ( सुउ. ४०.१३८ ) **प्रवाहिकाया भेदाः–रूक्षप्रभवजा–वातकृता, सशूला; तीक्ष्णप्रभवजा–सदाहा, पित्तजा; स्नेहप्रभवजा–कफजा, सकफा; तीक्ष्णोष्णप्रभवजा, रक्तजा, सशोणिता** (सुउ. ४०.१३९) **अतिसारवदामपक्वलिङ्गानि विद्यात्** ( सुउ. ४०.१४० ) **चिकित्सासूत्रम्–लघुदीपनस्निग्धा आहारौषधयश्चोपयुक्ताः** ( सुउ. ४०.१५६-५७ ) **तैलेन वातशान्तिर्भवति, वातशमनेन प्रवाहिका नश्यति, तस्मात् तैलप्रयोगः कार्यः, 'वाय्वाशये सतैले हि बिम्बिसी नावतिष्ठते ।'** ( अहचि. ९.४७ ) **वमनविरेचनयोः समानतया संख्यातासु त्रयोदशव्यापत्सु एका व्यापत्** ( सुचि. ३४.३ )
प्रवाहिका–आमांश, प्रकुपित झालेला वायु अयोग्य आहार घेणाऱ्या माणसाच्या संचित कफाला थोड्या मलासह मलमार्गाने लोटतो, त्या विकारास आमांश म्हणतात. ह्या विकारात कुंथून ( प्रवाहण करून ) शौचाला होते म्हणून प्रवाहिका म्हटले आहे. याचे भेद–[१] वात [२] पित्त [३] कफ [४] रक्त चिकित्सा – लघु, दीपन, स्निग्ध, आहार, औषधे द्यावीत. तेलाने वायु प्राकृत होतो म्हणून तेलाचा उपयोग करावा. गुदमार्गाने तेलाची पिचकारी देऊन तो वाताचा आशय तैलयुक्त ठेवल्याने आमांश नाहीसा होतो. वांती व रेचक यांच्या १३ उपद्रवांपैकी एक.

**प्रवाहिन्**–पु., **रोग० प्रवाहिका** ( र. १२.१-८ )
प्रवाहिका, आव-रक्ताची हगवण.

**( प्रवाहणी )**–स्त्री., शारीर० **गुदस्यान्तरे स्थिता तिर्यग्-वलीसंज्ञिता गुदपेशी; प्रवाहणी, मलप्रवाहणात् प्रवाहणी, सा गुदद्वारात्तृतीया वली गुदपेशी** ( असंनि. ७.५; सुनि. २.५ )
गुदमार्गात असणाऱ्या तीन वळींपैकी एक वळी, मळ बाहेर ढकलणारी. गुदद्वारापासून आत तिसरी वळी.

**प्रविकीर्णमात्र**–वि., **विक्षिप्तमात्रम्, अल्पविस्तृतम्** ( ड. सुक. ८.७९ ) थोडेसे पसरलेले.

**प्रविचार**–पु., **पृथग्भावः, प्रविभागः** ( सुउ. ६४.५६ )
प्रकार, विभाग.

**प्रविचारणा**–स्त्री., **उपयोगभेदः** ( चसू. १३.२५ )
केवल स्नेहाऐवजी स्नेहयुक्त भात इत्यादी अन्नाचा उपयोग करणे.

**प्रविभाग**–पु., **भेदः** ( सुचि. ३५.१ ) भेद, प्रकार.

**प्रविलयन**–न., **द्रवीकरणम्** (असंसू.३८.३) पातळ करणे.

**प्रविलायन**–वि., **क्षपणम्, द्रवीकरणम्** ( अहसू. २.५ )
पातळपणा आणणे, ऱ्हास करणे, कमी करणे.

**प्रविषम**–पु., **रोग० ज्वरभेदः, विषमः** ( र. १२.४०-४१ ) विषमज्वर.

**प्रवृत्त**–वि., **संभूतः** ( सुशा. ४.४ ) निर्माण झालेले.
**स्रुतम्** ( सुशा. २.१८ ) स्राव झालेले.

**प्रवृत्ति**–स्त्री.,**प्रवर्तनं नाम शरीरेणाभिसंबन्धः**(चसू.१.४४)
समान किंवा विशेषगुणी द्रव्यांचा शरीराशी संबंध येणे.
**आरम्भः** ( चवि. ८.१३१ ) **प्रतिकर्मसमारम्भः** ( चवि. ८.१२९ ) **प्रवृत्तिस्तु खलु चेष्टा कार्यार्था, सैव क्रिया, कर्म, यत्नः, कार्यसमारम्भश्च** ( चवि. ८.७७ ) **प्रथमाविर्भावः** ( चचि. ३.१४ )
वमन विरेचनादि कार्यांचा यथोचित उपयोग. वैद्य, औषध, रोगी, आणि परिचारक यांची यथायोग्य जुळवणी. कोणत्याही कार्यासाठी केलेली हालचाल; हिलाच क्रिया, कर्म, यत्न, कार्यसमारंभ म्हणतात.

दुःखम् ( चवि. ५.८ ) संसारः ( चनि. ५.९ )
प्रथम उत्पत्ति. दुःख. संसार.

**-हेतु**-पु., **उत्पत्तिहेतुः** ( चसू. १६.२८ )
उत्पत्तीचे कारण.

**प्रवेणी**-स्त्री., **गोणीति प्रसिद्धा** ( चक्र. चसू. ६.१५ )
गोण. पोते.
**ऊर्णावस्त्रम्** ( चसू. ६.१५) लोकरीचे वस्त्र.
**सूचीबाणाख्यं वस्त्रम्** ( अरु. अहृसू. ३.१३ )
जाळीने विणलेले वस्त्र.

**प्रवेपन**-न., **लक्षण० प्रकर्षेण वेपनम् कम्पनम्**
( चसू. १७.५६ ) थरथर कापणे.

**प्रवेश**-पु., **अन्तर्विगाहनम्** ( असंशा. १२.३ )
प्रवेश. आत बुडणे.

**प्रव्यक्त**-वि., **प्रकर्षेण व्यक्तः, स्फुटः** ( सुशा. ३.१८ )
स्पष्ट झालेले. अगदी स्पष्ट.

**-रूप**-वि., **सुव्यक्तस्वरूपः** ( सुउ. ३९.१०० )
स्पष्ट झालेले स्वरूप.

**-लक्षणता**-स्त्री., **लक्षणानां स्फुटत्वम्**
( सुसू. २१.३४ ) लक्षणे स्पष्ट असणे.

**प्रव्यक्ति**-स्त्री., **स्पष्टता, निरावरणता**
( ड. सुचि. ३८.२१ ) स्पष्टता, आवरण नसणे.

**प्रव्रजित**-पु., **प्रव्रज्यालक्षणतपोयुक्तः तपस्वी**
( सुसू. २.८ ) तपस्वी.

( **प्रव्रजिता** )-स्त्री., **गृहीतव्रता** ( ड. सुचि. २४.११६ )
तपस्वी स्त्री, व्रत घेतलेली.
**वनस्पति० मुण्डी** ( ध. १.१५९ ) गोरखमुंडी.

**प्रव्रज्या**-स्त्री., **संन्यासः** ( कासू. २८ ) संन्यास.

**प्रशम**-पु., **प्रकर्षेण शमनम्** ( चसू. १७.११४ )
**रोगोपघातमात्रस्योपलक्षणम्, तेन साध्यानां सिद्धिर्याप्यानां यापनं, स्वस्थवृत्तं च गृह्यते** ( सुसू. १.३५ ) **अन्तरिन्द्रियशान्तिः, प्रशमोऽयं सर्वपथ्यानां श्रेष्ठः** ( चसू. २५.४० ) **स्वयमुपशमः** ( सुसू. १.३४ )
रोग कमी होणे, साध्य असेल तो संपूर्ण बरा होणे, याप्य असेल तो तीव्रता कमी होऊन औषध आणि पथ्य याचे काबूत ठेवणे, प्रकृति समतोल ठेवणे, रोग आपोआप शांत होणे.
**चिकित्सा, प्रशाम्यति अनेन रोग इति प्रशमः चिकित्सायां गृहीततात्पर्योऽत्र द्रष्टव्यः** ( चचि. १२.३ )
ज्याने रोग बरा होतो असे उपचार.

**प्रशमन**-न., **भेषजम्** ( चचि. १.३ ) औषध.
**चिकित्सा** ( सुसू. ३.२६ ) चिकित्सा, उपचार.

**प्रशस्त**-वि., **प्रशंसितम्, स्तुतम्** ( सुक. १.१२-१३ )
स्तुती केलेले. प्रशंसिलेले.

**-देश**-पु., **धन्वदेशः, साधारणदेशः सन्मृत्तिकायुक्तदेशश्च** ( सुसू. ३४.२२ )
सुयोग्य किंवा आरोग्यदायक देश, धन्वदेश, किंवा साधारण देश असून मातीचा देश.

**प्रशस्तार्तव**-न., **अदुष्टार्तवम्, शुद्धार्तवम्**
( सुशा. २.१७ ) दुष्ट नसलेले रज. शुद्ध रज.

**प्रशाखा**-स्त्री., **प्रकृष्टा शाखा हस्तपादस्वरूपा** ( सुचि. ३.५४ )
मुख्य शाखा. हातपाय ह्या शरीराच्या मुख्य शाखा

**प्रशात**-पु., **शटनम्, उच्चाटनम्, प्रणाशः** ( सुनि. १०.६ )
नाहीसे करणे.

**प्रशातिका**-स्त्री., **धान्य 'उडिका' इति प्रसिद्धा** ( चसू. २१.२५ ) **जलमध्ये प्रायो भवति** ( चक्र. चचि. ४.३६) **श्यामाकसदृशैर्गुणैः युक्ता, इयं कषायमधुरशीतलघुवातलकफपित्तघ्नसंग्राहिशोषणादिगुणा** ( चसू. २७.१७ )
देवभात, पाण्याचे आश्रयात होणारे भात; वऱ्याच्या तांदळासारखा. **गुण**-तुरट, गोड, थंड, हलका, वातुल, कफपित्तनाशक, मळ घट्ट व शुष्क करणारा.

**प्रशान्ति**-स्त्री., **अपगमः** ( चसू. १८.५)
जाणे, शमन होणे, नाहीसे होणे.

**प्रशान्तिका**-स्त्री., **धान्य० प्रशान्तिका** ( चसू. २७.१७ )
देवभात.

**प्रशिथिलाशय**-पु., **अस्तब्धपक्वाशयः**
( ड. सुउ. ३९.१२७ ) शिथिल पक्वाशय.

**प्रश्न**-पु., **अभिधानप्रयोजनादिजिज्ञासा** ( चवि. ८.५२ ) **पूर्वापरविरोधादिदोषशून्येन वाक्येन पृच्छा** ( चसू. ३०.६९ )
कार्य कारण समजण्यासाठी व्यक्त केलेली अपेक्षा, पूर्वापरविरोध इ० दोष नसलेले वाक्य उच्चारून प्रश्न करणे.
**षड्विधरोगविज्ञानोपायेष्वेकः** ( सुसू. १०.५ )
सहा प्रकारचे रोग जाणून घेण्याच्या उपायांपैकी एक.

**प्रश्रय**-पु., **सभ्यता** ( असंशा. ८.२४ ) सभ्यता.

**प्रश्वास**-पु., **लक्षण० प्रकृष्टं श्वसनम्** ( चवि. २.६ )
**अन्तःप्रविशद्वायुः** ( सुशा. ९.५ )

जोराने लागलेला श्वास. श्वासमार्गाने शरीरात प्रवेश करणारा वायु.

**प्रसक्त**-वि., **निरन्तरम्** ( चक्र. चचि. २०.१५; सुउ. ५२.७ ) सारखे, सतत. कायमचे चिकटलेले. **भूयो भूयोऽनुषङ्गि** ( सुउ. ४६.१८ ) **अत्यासक्तम्** ( सुउ. ३९.६२ )
पुनः पुन्हा उत्पन्न होणारी (मूर्च्छा). अतीशय संलग्न.

**-च्छर्दि**-वि., **लक्षण० यस्य सतता छर्दिः सः** ( चसि. २.८ ) सतत होणारी ओकारी.

**-वमथु**-वि., **लक्षण० प्रसक्तच्छर्दिः** ( अहसू. १८.४ ) सारखी होणारी ओकारी.

**-श्वसन**-(परिव०) न., **लक्षण० निरन्तरं श्वसनम्** (सुनि. १६.६१) सारखा दम लागणे.

**प्रसङ्ग**-पु., **तन्त्रयुक्ति० प्रसङ्गो नाम पूर्वाऽभिहितस्यार्थस्य प्रकरणागतत्वादिना पुनरभिधानम्** ( चसि. १२.४३ ) **प्रकरणान्तरेण समापनं प्रसङ्गो यद्वा प्रकरणान्तरितो योऽर्थोऽसकृदुक्तः समाप्यते स प्रसङ्गः** ( सुउ. ६५.२२ )
एक वेळ सांगितलेल्या अर्थाची प्रसंगानुसार पुनरुक्ति. एका प्रकरणात सांगितलेला विषय दुसऱ्या प्रकरणात सांगून संपविणे; किंवा विषय निराळ्या प्रकरणात सांगितलेला पुन्हा सांगून परिपूर्ति करणे.
**अभ्यासः** ( चसि. १२.३२ ) अभ्यास, परिशीलन.
**उपभोगः** ( चनि. ४.५ ) सेवन.
**मैथुनम्** ( सुनि. ५.३३; मधुकोष. मा. कुष्ठ. ४२ ) मैथुन, स्त्रीसंभोग.
**सातत्यम्** ( मधुकोष. सुनि. ५.३३; मा. कुष्ठ. ४२ ) नित्य, अखंड.

**प्रसङ्गित्व**-न., **आसक्तिः** ( सु.शा. ४.५२ ) आसक्ति.

**प्रसङ्गिन्**-वि., **संसक्तः** ( ड. सुउ. ३९.११८ ) सारखा टिकून असलेला ( ज्वर ).

**प्रसन्न**-वि., **प्रकृतिस्थम्**, **निर्मलम्** ( सुसू. १४.५ ) आनंदी, निर्मळ, प्राकृत.

**( प्रसन्ना )**-स्त्री., **मद्य० सुरा** ( चक. ७.१३; ध. ६.२५५ ) दारू.
**सुराया मण्डः, उपर्यच्छो भागः, तस्या गुणाः—छर्द्यरोचकहृत्कुक्षितोदशूलप्रमर्दनी कफवातार्शोविबन्धाऽऽनाहनाशनी च** ( सुसू. ४५.१७७-७८ )
सुरे ( दारू ) वरील स्वच्छ निवळ. **गुण**-ओकारी, अरोचक, हृदयकुक्षितोद, शूल नाहीसे करणारी आहे. कफ, वात, अर्श, विबंध नाहीसा करणारी आहे.

**-दोष**-वि., **स्वभावाऽवस्थितवातादिकः इदमविषमनुष्यलक्षणम्** ( ड. सुक. ६.३२ )
शरीरात दोषांची नेहमीप्रमाणे स्थिति असणे. हे विषबाधा नष्ट झाल्याचे लक्षण आहे.

**-वदना**-वि., **निर्मलमुखी** ( सुशा. ३.७ ) आनंदी चेहरा असलेली.

**प्रसन्नात्मन्**-वि., **संतुष्टान्तःकरणः** ( सुउ. ३९.१०४-५) समाधान, आनंदी अंतःकरण असलेला.

**प्रसभम्**-( अव्य. ) **बलात्, हठात्** ( चवि. ३.२० ) बलाने, बलात्काराने, हट्टाने.

**प्रसर**-पु., **दोषगति० प्रसरणम्, वातपित्तश्लेष्मणां बलवद्विग्रहादिभिः प्रकुपितानां किण्वोदकपिष्टसमवाय इवोद्रिक्तानां प्रसरो भवति। तेषां वायुर्गतिमत्त्वात् प्रसरणहेतुः सत्यप्यचैतन्ये, स हि रजोभूयिष्ठः; रजश्च प्रवर्तकं सर्वभावानाम्, यथा—महानुदकसंचयोऽतिवृद्धः सेतुमवदार्यापरेणोदकेन व्यामिश्रः सर्वतः प्रधावति, एवं दोषाः कदाचिदेकशो द्विशः समस्ताः शोणितसहिता वाऽनेकधा प्रसरन्ति। तद्यथा—वातः, पित्तं, श्लेष्मा, शोणितं, वातपित्ते वातश्लेष्माणौ, पित्तश्लेष्माणौ वातशोणिते, पित्तशोणिते, श्लेष्मशोणिते, वातपित्तशोणितानि, वातश्लेष्मशोणितानि, पित्तश्लेष्मशोणितानि, वातपित्तकफाः, वातपित्तकफशोणितानीति; एवं पञ्चदशधा प्रसरन्ति। एष दोषगतौ तृतीयः क्रियाकालः** ( सुसू. २१.२८ )
प्रसर म्हणजे दोष शरीरभर पसरणे. अधिक बलवंताशी कुस्ती करणे यासारख्या आपआपल्या कारणाने प्रकुपित झालेले वातादिदोष ज्याप्रमाणे आंबट पदार्थ अधिक आंबू लागला म्हणजे फसफसतो व भांड्याच्या बाहेर पडू लागतो. सर्व शरीरभर एक एक, दोन अथवा तीनही किंवा रक्तासह मिळेल त्या मार्गात प्रवेश करतात. एकूण ही मिश्रणे होऊन पसरण्याचे प्रकार १५ आहेत ( १ ) वात ( २ ) पित्त ( ३ ) कफ ( ४ ) रक्त ( ५ ) वातपित्त ( ६ ) वातकफ ( ७ ) पित्तकफ ( ८ ) वातरक्त ( ९ ) पित्तरक्त ( १० ) कफरक्त ( ११ ) वातपित्तरक्त ( १२ ) वातकफरक्त ( १३ ) पित्तकफरक्त ( १४ ) वातपित्तकफसन्निपात ( १५ ) वातपित्तकफरक्तसन्निपात.

प्रसरणाचे वायु हा कारण आहे, कारण तो वायु अचेतन असूनही गतिमान आहे. तो रजोभूयिष्ठ आहे. रजोगुण हाच सर्व भावांचा प्रवर्तक आहे. विशिष्ट स्थानात जलसंचय अधिक झाला म्हणजे तो जसा मर्यादा उल्लंघून बाहेरच्या इतर जलाशी मिश्र होऊन वाट फुटेल तिकडे पसरत जातो, तशी येथे दोषांची अवस्था होते. पसरण्याच्या ह्या अवस्थेलाच दोषांचा 'प्रसर' असे म्हटले आहे. दोषांच्या चिकित्सेचा हा तिसरा काल होय.

**न., वनस्पति० एलावालुकम्** ( ध. ३.७६ ) सुगंधी द्रव्य.

**प्रसरण**–(परिव०) न., **भ्रमणम्** (सुउ. ६०.१३) पसरणे.

**–सामर्थ्य**–न., **स्थानात्स्थानान्तरगमनसामर्थ्यम्** ( सुचि. १.५ ) ह्या स्थानातून त्या स्थानात फैलावत जाण्याची शक्ति.

**प्रसव**–पु., **जन्म** ( सुशा. ५.४५ ) जन्म.

**कुसुमम्** ( सुक. ६.२० ) केशर, फूल.

**फलम्** ( सुक. ६.२० ) फळ.

**वनस्पति० कुरुबकः** ( रा. १०.४१३ ) तांबडी कोरांटी.

**–काल**–पु., **प्रसूतिकालः, गर्भजन्मकालः** ( चशा. ४.२५ ) गर्भाची जन्मवेळ.

**–धर्मिणी**–स्त्री., **प्रकृतिः, महदहङ्कारादिक्रमेण चराचरस्य जगतः प्रसवित्री** ( सुशा. १.९ ) प्रकृति. महान अहंकार इ० क्रमाने सर्व चराचर जगताला उत्पन्न करणारी.

**प्रसवन**–वि., **प्रसूतिकारकम्, प्रसूयते अनेन सहायभूतेन इति प्रसवनं प्रसवजनकम्** ( चचि. २९.१०९ ) सुखाने प्रसूति करणारे साधन किंवा विधि.

**प्रसवमाना**–वि., **प्रजायमाना** ( सुशा. १०.६६ ) प्रसूत होणारी.

**प्रसह**–पु., **मृगपक्षिजाति०** (चसू. ६.१२; सुसू. ४६.७४) **प्रसह्य भक्षयतीति प्रसहः, स द्विविधः— मांसादोऽमांसादश्च** ( चसू. २७.५४ ) **तन्नामानि— गोखराश्वतरोष्ट्राऽश्वद्वीपिसिंहर्क्षवानरमार्जारमूषकव्याघ्रवृकबभ्रुतरक्षुलोपाकजम्बुकश्येनचाषोलूकश्ववायसशशघ्नीभासकुररगृध्रवेश्यकुलिङ्गकधूमिकामधुहाश्चेति** ( असंसू. ७.७७–७९ ) **तन्मांसगुणाः– प्रसहमांसं मधुरगुरुस्निग्धोष्णं, बलोपचयवर्धनं, वृष्यं, वातहरं, कफपित्तवर्धनं, व्यायामनित्यदीप्ताग्नीनां च हितम्, मांसाशिप्रसहमांसम् जीर्णार्शोग्रहणीदोषशोषार्तानां हितावहम्** ( चसू. २७.५६ ) **भस्मकरोगोन्मादशुक्रक्षयनाशकः** ( धपरि. २.१४ ) झडप घालून भक्ष्य खाणारे पशु व पक्षी. हे दोन प्रकारचे. ( १ ) केवळ मांसच खाणारे ( २ ) मांस न खाणारे. त्यांची नावे– गाय, गाढव, खेचर, उंट, घोडा, हत्ती, सिंह, अस्वल, वानर, मांजर, उंदीर, वाघ, भेडिया, बभ्रु ( लांब केस असलेला रानटी कुत्रा ), तरस, लोपाक नावाचा कोल्हा, कोल्हा, ससाणा, तास, घुबड, कुत्रा, कावळा, बहिरी ससाणा, कोंबडा, करकोचा, गिधाड, वेश्य, चिमणी, धूमिका, आणि मधुहा.

प्रसह प्राण्यांच्या मांसाचे **गुण**— मधुर, गुरु, स्निग्ध, उष्ण, मांस मेदाचे बल वाढविणारे, शुक्रवर्धक, वातनाशक, कफपित्तवर्धक, नेहमी व्यायाम करणारे व ज्यांचा अग्नि प्रदीप्त आहे त्यांना हितकारक.

मांस खाणारे प्रसह प्राण्यांचे मांस **गुण**— जुनाट मूळव्याध, ग्रहणी, क्षय यांनी पीडित असलेल्यांना हितावह आहे. भस्मक नावाच्या रोगात तसेच उन्माद आणि शुक्रक्षयरोगात गुणकारी आहे.

**प्रसाद्**–पु., **प्रसन्नता** ( चशा. ५.५ ) **आरोग्यस्थापनः अनाबाधकरः शारीरभावः सः** ( चशा. ६.७४ ) प्रसन्नता, शरीराचा आरोग्यस्थापक दुःख-रोगनाशक धर्म.

**स्वच्छो मलरहितो भागः आहारप्रसादः, आहाररसः** ( चचि. १५.१६ ) स्वच्छ, मल नसलेला भाग, आहारापासून उत्पन्न झालेला निर्मल भाग, आहाराचा पचनानंतर बनलेला रस.

**उपरिस्थितोऽघनो भागः** ( चसि. ७.१४ ) वरचा थोडा पातळ भाग.

**सारभागः** ( सुशा. ४.२६ ) सारभाग, उत्कृष्ट दर्जाचा भाग, सत्व.

**–भूत**–वि., **प्रसादस्वरूपः** ( चशा. ६.१७ ) प्रसन्नस्वरूप, प्रसादरूप, साररूप.

**प्रसादन**–वि., **वैशद्यकरम्** ( चसू. ५.१६ ) **स्वच्छतापादकम्** ( चसू. १३.१४ ) स्वच्छता करणारे, सुखदायक, शमवणारे.

**प्रसाधन**–(परिव०) न., **साधनम्** ( सुचि. २०.४ ) साधन, उपचार, उपाय.

**स्पष्टीकरणम्, विशदीकरणम्** ( सुउ. ६५.६ ) सुस्पष्ट करणे, विशद करणे, विस्ताराने सांगणे.

**प्रसाधिका**-स्त्री., धान्य० व्रीहिः ( रा. १६.९८ )
जिरगे भात.

**प्रसाधित**-वि., **संस्कृतम्** ( सुसू. ४५.१५-१६ )
अलंकृत, उकळणे, गाळणे, इ० संस्कार केलेले.

**प्रसारण**-न., **विस्तारणक्रिया** ( सुशा. ७.३ )
उघडणे, विस्तार करणे.

( **प्रसारणी**)-स्त्री., स्वनामख्यातो लता०
( चचि. २८.१६६; सुचि. १५,४४-४५ ) **तस्या गुणाः- तिक्तोष्णा, गुर्वी, सरा, संधानकरी, वृष्या, तेजःप्रदा, कान्तिप्रदा, त्रिदोषघ्नी, बलप्रदा, अर्शः-शोथविष्टम्भनाशिनी** ( ध. १.२८९ )
हिं.—गन्धप्रसारणी.
**म.—प्रसारणी, चान्दवेल.**
गु.—प्रसारणवेल्य.
बं.—गन्धभादला.
ता.—पेनारीसंगाड्.
चांदवेल. **गुण**— कडु, उष्ण, गुरु, सारक, हाड जोडणारी, शुक्रवर्धक, तेजदायक, कांतिदायक, त्रिदोषनाशक, बलदायक, मूळव्याध, सूज, विष्टंभ-नाशक.

**प्रसारिणी**-स्त्री., लता० **प्रसारणी** ( रा. ५.१५९ )
चांदवेल.
**लज्जालुः** ( रा. ५.१५९ ) लाजाळु.

**प्रसिद्धकेश**-वि., **प्रसाधितकेशः कंकतेन रचितकेशः** ( चसू. ८.१८ )
विभूषित केसांचा. चांगल्या तऱ्हेने केसांची रचना केलेला. फणी, कंगवा यांनी केस व्यवस्थित केलेला.

**प्रसुप्तता**-स्त्री., लक्षण० **स्पर्शज्ञाननाशः** ( सुनि. १.३३; सुनि. १.८१ )
बधिरपणा, स्पर्शज्ञान नसणे, स्पर्श न कळणे.

**प्रसुप्ति**-स्त्री., क्षुद्ररोग० **वायुनोदीरितः श्लेष्मा त्वचं प्राप्य विशुष्यति। ततस्त्वक्पाण्डुः, क्रमेण विचेतनाऽल्प-कण्डूरविक्लेदा च भवति। प्रसुप्तिश्चासौ व्याधिः प्रसुप्त्याख्यः** ( असंउ. ३६ )
प्रसुप्ति—क्षुद्ररोगाचे नाव. हा विकार वायूने प्रेरित कफ चलित होऊन त्वचेमध्ये जाऊन सुकतो, तेव्हा त्वचा क्रमशः पांढरी होते. हळूहळू तेथील संज्ञाज्ञान कमी होते. थोडीशी खाज सुटते. क्लेद वगैरे नसतो. या विकारास बाधिर्य (संज्ञानाश) येणे म्हणून या विकाराचे नाव प्रसुप्ति असे आहे.

**लक्षण० स्पर्शाज्ञानम्** ( अहसू. २२.२६ )
स्पर्श न कळणे.

**प्रसूति**-स्त्री., **अपत्योत्पत्तिः** ( चचि. १२.६ )
अपत्याचा जन्म, बाळंत होणे.
**-ग्रह**-न., **प्रसूतिनिग्रहम्, गर्भसंगम्** ( र. ५.२३९ )
गर्भ अडणे, प्रसूति थांबणे.
**-मारुत**-पु., **प्रसूतिकारको वातः** ( चशा. ६.२४ )
प्रसूती करणारा वायु. अपान.

**प्रसून**-न., **पुष्पम्** ( र. १७.४३-४६ ) फूल.

**प्रसृत**-वि., **विस्तृतः** ( सुचि. १.४ ) लांब रुंद.
**निर्गतम्** ( सुशा. ९.१३ ) गेलेले, निघालेले.
**संयुक्तपञ्चाङ्गुलिः, ईषद्विस्तृतपाणिरेव** ( सुचि. ३१.६ )
हाताचा पसा, पंजा, पाचही अंगुळ्या जोडून थोडा पसरलेला पंजा.
**मान० पलद्वयम्** ( चक. १२.९२ )
दोन पळे, आठ तोळे प्रमाण.
**षोडशतोलकाः**(र. २६.५-७) १६ तोळे प्रमाण.

**प्रसृति**-स्त्री., **मान० पलद्वयम्** ( सुचि. ६.१८ )
प्रमाण, २ पळे, आठ तोळे.

**प्रसेक**-पु., **लक्षण० लालास्रावः** ( चनि. १.२१; सुचि. २४.२३ ) तोंडाने लाळेचा स्राव.
**प्रक्षरणम्** ( परिव० ) ( सुचि. १.४७; सुक. ४.३७ ) पाझरणे.

**प्रसेचन**-न., उपक्रम० **सिञ्चनम्** ( चचि. ७.१५९ )
शिंपडणे.

**प्रसेवक**-पु., **चर्मखल्लपुटः** (ड. सुसू. ९.४) '**हतिश्चर्म-प्रसेविका**' **इत्यमरः।** पखाल.

**प्रस्कन्दन**-न., **विरेचनम्** ( चसू. १३.८० )
विरेचन, रेचक.

**प्रस्खलन**-न., **आखुडनादि** ( ड. ) **अकस्मात् प्रभ्रंशः पादाऽपसरणं वा** ( सुनि. ८.३ )
अकस्मात घसरणे, पडणे, पाय सरकणे.

**प्रस्तम्भ**-पु., लक्षण० **प्रकर्षेण स्तब्धता** ( सुसू. ३२.३ )
जखडणे.

**प्रस्तर**-पु., **स्वेद० प्रस्तरस्वेदः** ( सुचि. ४.१०; चसू. १४.२७ ) स्वेदाचा एक प्रकार. प्रस्तरस्वेद.
**-स्वेद**-पु., **स्वेद० त्रयोदशस्वेदेष्वेकः** (चसू. १४.२७,४२) **सुश्रुतमतानुसारेणास्याप्यन्त-र्भावो बाष्पस्वेदे भवति। स्वेदविधिः—कोलधान्यानि वा सम्यगुपस्वेद्यास्तीर्य किलिञ्जे तत्प्रतिरूपकेऽ-**

न्यस्मिन् वा शयानं प्रावृत्य स्वेदयेत् । एवं पांशुगोशकृत्तुषबुसपलालोष्मभिः स्वेदयेत् (सुचि., ३२.११) तेरा स्वेदांपैकी एक स्वेदप्रकार. सुश्रुतमताने याचा अंतर्भाव बाष्पस्वेदामध्येच होतो. **स्वेदविधि**-शेंगेत होणारी निरनिराळ्या प्रकारची धान्ये उकडून ती एखाद्या फळीवर पसरावी व वर एखादी घोंगडी किंवा कांबळे पांघरून झोपावे व शेक घ्यावा. धान्याप्रमाणेच वाळू, निरनिराळ्या धान्याचे कोंडे, वाळलेले शेण, कडबा किंवा पेंढा, लाकडाचा भुसा यासारखे पदार्थ गरम करून पसरून त्यावर झोपून हा प्रस्तरस्वेद घेता येतो.

**प्रस्तरिणी**-स्त्री., वनस्पति० **गोलोमिका** ( रापरि. ५.३२) पाथरी, गोजा, गोजिव्हा.

**प्रस्तार्यर्मन्**-न., नेत्ररोग० **नेत्रशुक्लगतोऽयम् सिते मृदु आशुवृद्धि अरुक् श्यावलोहितं प्रस्तारि मांसं** जायते ( असंउ. १३ ) **नेत्रस्य शुक्लभागे विस्तीर्णं विरलं रक्तनिभमीषन्नीललोहितं जायते स प्रस्तार्यर्माख्यो नेत्ररोगः** ( सुउ. ४.४ ) **एष साध्यो रोगः** (सुउ. १.४०) **स च लेखनीयः** (सुउ. १५.१७) प्रस्तार्यर्मन् हा एक नेत्रविकार आहे. डोळ्यातील पांढऱ्या भागावर काळसर तांबूस असे पसरणारे मांस उत्पन्न होते. ते विरल, निळसर, तांबूसही असते. त्यास प्रस्तार्यर्म असे म्हणतात. हा रोग साध्य आहे.

**प्रस्थ**-पु., मान० **शरावद्वयपरिमाणम्** ( सुचि. २७.१२ ) **चतुष्षष्टितोलकमानम्** ( र. ९.५१ ) **सार्धत्रयोदशपलानि** ( सुशा. ८.१६ ) **कुडवचतुष्टयं वा** ( र. ११.७; चक. १२.९४ )
प्रमाण- दोन शराव, ६४ तोळे, साडेतेरा पले. चार कुडव.

**-कुसुम**-पु., वनस्पति० **जम्बीरः** (रा.१०.८१) लिंबु.

**प्रस्थान**-न., **प्रयाणम्** ( सुसू. २९.२७ ) जाणे.

**प्रस्पन्द**-पु., लक्षण० **स्पन्दनम्** ( असंसू. १९.३ ) स्पंदन; कंप.

**प्रस्पन्दन**-न., लक्षण० **शरीरस्य चलनम्** ( सुसू. १५.४ ( १ ) मोठ्याने हालचाल. शरीराची हालचाल.

**प्रस्रंसन**-न., **स्रावः** ( चचि. २६.११९ ) स्राव.

**प्रस्रंसिनी**-स्त्री., योनिरोग० **या रतिप्रसङ्गात् क्षोभिताऽतीवार्तवं स्रवति दाहपाकादियुता दुःखेन च प्रसूयते, इयं पित्तजा** ( सुउ. ३८.१३ ) जिच्या योनीतून संभोगानंतर अति स्राव होतो, दाह, पाक इत्यादी होऊन जी कष्टाने प्रसूत होते ती. ही पित्तज योनीची स्त्री.

**प्रस्रवण**-न., **निर्झरः** ( चसू. २७.२१४ ) पाझरणे, झरा.
(परिव०) **जलप्रपातः** ( असंउ. ४९ ) धबधबा.
**स्रावः** ( चनि. ५.११ ) स्राव.
**दुग्धम्** ( ध. ६.१६१ ) दूध.

**प्रस्रवणोद्भव**-वि., **प्रस्रवणोद्भूतं ( जलम् ) निर्झरजलम्** ( सुसू. ४५.३४ ) झऱ्याचे पाणी.

**प्रस्राव**-पु., **मूत्रम्** ( हे. अहसू. २०.२८ ) मूत्र.

**प्रस्रुत**-वि., **गलितमदः ( भद्रहस्ती )** ( सुचि. २९.१६ ) मस्ती उतरलेला, मस्ती कमी झालेला (हत्ती).
वि., **वस्त्रेण गालितम्** ( चक. २.८) वस्त्राने गाळलेले.

**प्रस्वपन**-न., **गाढनिद्रा** ( चचि. १५.२३३ ) गाढ झोप.

**प्रस्वेद**-पु., लक्षण० **स्वेदाधिक्यम्** ( र. १२.११ ) स्वेद अधिक होणे, अधिक घाम.

**प्रहरजाया**-स्त्री., वनस्पति० **कुटुम्बिनी** ( रापरि. ५.२२ ) दूध निघणारी पाण्यात होणारी वनस्पती.

**-प्रहर्ष**-पु., **तुष्टिः** ( सुसू. १५.७ ) संतोष.

**-जनन**-न., **स्वस्थस्य शुक्रवृद्धिस्रुतिकरत्वं च** ( सुसू. १.८(८)) निरोगी अवस्थेत शुक्रवाढ आणि स्राव करणारे.

**प्रहर्षित**-वि., **स्तब्धम्** ( ड. सुचि. ३७.११० ) ताठलेले.

**प्रहर्षिन्**-वि., **शीतरूक्षप्रवाताम्लस्पर्शासहः (दन्तः)** ( कासू. २०.८ ) शिवशिवणारे दात. थंड, रूक्ष, वारा, आंबट, सहन न होणारे ( दात ).

**प्रहसन्ती**-स्त्री., वनस्पति० **वासन्ती** ( ध. ५.१३९ ) वसंतात फुलणारी सुगंधी वनस्पती, माधवी.

**प्रहार**-पु., **आघातः** ( सुनि. १५.३ ) **ताडनम्** ( चसू. १८.४ ), मार, आघात.

**प्रहृष्टा**-वि., **प्रसन्नमनाः** (सुशा. १०.३) संतुष्ट मनाची.

**प्रह्लाद**-पु., **तृप्तिः** ( अहसू. ९.७ ) संतोष, तृप्ती.

(**प्रह्लादी** )-स्त्री., वनस्पति० **हंसपादी** ( रा. ५.१६७ ) राजहंस.

**प्रह्लादन**-न., **सुखकरणम्** ( सुचि. १.१६ ) सुखकारक.

**-तैल**-न., तैल० **यवमञ्जिष्ठाम्लादिसिद्धमिदं तैलं दाहज्वरविनाशकम्** ( सुउ. ३९.२८७ ) प्रल्हादन तेल. जव, मंजिष्ठ, इ० सिद्ध तेल. दाह, ज्वरनाशक.

**प्रह्व**–वि., **जानुभ्यामवनतः** ( इन्दु. असंउ. ३ )
गुडघ्यात वाकलेला.

**प्रांशु**–पु., **वनस्पति०** **तालः** ( ध. ५.६८ ) ताड.
वि., **दीर्घाकृतिः** ( असंउ. ४१ )
फार लांब, दीर्घाकार, उंच.

**प्राक्**–अव्य., **पूर्वम्, आदौ प्रथमम्** ( सुसू. ३५.१८ )
पूर्वी, आरंभी, प्रथम.

**–केवल**–पु., **प्रागेवोत्पन्नो व्याधिरपूर्वरूपोऽनुपद्रवश्च** ( सुसू. ३५.१८ )
स्वतंत्रव्याधि, पूर्वरूप किंवा उपद्रव याशिवाय उत्पन्न झालेला रोग.

**–चरणा**–स्त्री., **योनिरोग०** ( चचि. ३०.२० ) **अतिबालाया मैथुनाद्वायुः पृष्ठजङ्घोरुवङ्क्षणं रुजन् योनिं संदूषयेत्** ( असंउ. ३८ ) **उचितव्यवायकालात् प्राक् व्यवायाचरणात् 'प्राक्चरणा' उच्यते** ( चक्र. चचि. ३०.२० )
योग्य वय नसताना केलेल्या मैथुनाने निर्माण झालेला योनिरोग. वायु, पाठ, जांघ, मांडी, इत्यादींमध्ये पीडा व योनिदुष्टि करतो.

**–प्रवण**–वि., **प्राच्यां दिशि निम्नम्, प्रागभिमुखम्** ( चशा. ८.१० )
पूर्वेकडे वाकलेले. पूर्वेकडे तोंड केलेला.

**–शिरस्**–वि., **प्राक्शीर्षः** ( असंसू. २८.२९ )
पूर्वेकडे डोके असलेला.

**( प्राग् )–जन्माभ्यास**–पु., **पुर्वजन्माभ्यासः** ( असंशा. १.७१ ) पूर्वजन्माचा अभ्यास.

**–दैहिक**–वि., **पूर्वदेहभवम्, जन्मान्तरकृतम्** ( चनि. १.३५ ) पूर्वजन्मी केलेले.

**–भक्त**–वि., **औषधकाल० भोजनात्पूर्वमुपयुज्यमानम् ( औषधम् ) तद्गुणाः–औषधं शीघ्रं विपाकमुपयाति बलं न हिंस्यात्, आहारावृतत्वान्मुहुर्वदनान्न निरेति, वृद्धशिशुभीरुकृशाङ्गनाभ्यः प्राग्भक्तमौषधं देयम्** ( सुउ. ६४.६८-६९ ) **अपाने विगुणे सति प्राग्भुक्तमौषधं देयम्** ( अहृसू. १३.३८ )
जेवणापूर्वी औषध घेणे म्हणजे प्राक्भक्त. हा औषध घेण्याचा काल आहे. असे जेवणापूर्वी घेतलेले औषध लवकर पचन होते. बल कमी न होता आहाराचे आवरण झाल्यामुळे ते तोंडातून बाहेर येत नाही. म्हातारे, मुले, भित्रे, बारीक अंगाचे व स्त्रिया यांना जेवणापूर्वी औषध द्यावे, अपानवायु विकृत झाला असतानाही द्यावे.

**–भुक्त**–न., **प्रातर्भोजनम्** ( सुसू. ४६.४९२ )
सकाळी जेवणे.

**–रूप**–न., **पूर्वरूपम्** ( असंनि. ८.१० )
पूर्वरूप, सुरवातीचे लक्षण.

**–वात**–पु., **पूर्वदिगागतो वातः** ( चसू. ६.४५ )
पूर्वेकडचा वारा.

**–वातसेवा**–स्त्री., **पूर्वदिगागतस्य वातस्य सेवनम्** ( चचि. १४.१९ )
पूर्वेकडून आलेल्या वाऱ्यात हिंडणे, बसणे, झोपणे इ०

**–वायु**–पु., **प्राग्वातः** ( असंसू. १२.९५-१६ )
पूर्वेकडचा वारा.

**–विकृत**–वि., **पूर्ववर्णादन्यथाभूतो** ( चइ. १.९ )
पूर्वीचा वर्ण बदलणे.

**प्राक् ( ग् )–अपीत**–वि., **प्राक्–पूर्वं न पीतं येन, सः** ( ड. सुचि. ३३.४४ ) पूर्वी न प्यालेला.

**प्राक् ( ग् )–उत्पत्ति**–स्त्री., **प्राक्कालोत्पत्तिः**, ( चचि. १९.३ )
पूर्वोत्पत्ति. रोगाच्या (अतिसार) उत्पत्तीचा इतिहास.

**( प्राङ् )–मुख**–वि., **संमुखः प्राचीमभिमुखीकृत्य स्थितः** ( अहृसू. १८.१७ )
समोर बसलेला, पूर्वेकडे तोंड करून बसलेला.

**प्राकार**–पु., **परिसरः** ( असंसू. ९.१२१ )
तट किंवा भिंत घालून तयार केलेले आवार.

**प्राकाश्य**–न., **प्रसिद्धिः** ( सुसू. २.६ ) प्रसिद्धि.

**प्राकृत**–वि., **स्वाभाविकम्** ( चसू. १८.५२ ) **सहजगुणसंपन्नम्** ( चचि.३०.१२६ ) स्वाभाविक.

**( प्राकृति )**–वि., **गति० स्वाभाविकी** ( चसू. १७.११५ )
स्वाभाविक गति.

**–मस्तु**–न., **केवलस्य दध्नो यन्मस्तु, तत् प्राकृतमस्तु** ( चचि. १२.३० ) केवळ दह्यावरची निवळ.

**प्राची**–स्त्री., **पूर्वदिक्** ( अहृसू. ५.११ ) पूर्वदिशा.

**–बल**–पु., **वनस्पति० काकजङ्घा** ( ड. सुसू. ३८.१८-१९ ) कावळी.
**मत्स्याक्षकः** ( सुसू. ३८.१८-१९ )
ब्राह्मीप्रकार. गाठी हरळी.
**नदीपिप्पली** ( सुसू. ३८.१८-१९ ) पिंपळी, जलपिंपळी.
**गण्डदूर्वा** (सुसू. ३८.१८-१९) दूर्वाभेद, गाठी दूर्वा.
**जलपिप्पली** ( सुसू. ३८.१८-१९ ) जलपिंपळी.

**प्राचीना**–स्त्री., **वनस्पति० पाठा** ( ध. १.७० )
पाठा. पहाडमूळ.

**प्राचीनागर**–न., वनस्पति० आमलकीभेदः ( असंसू. ७.१९७ ) आवळी, पाणआवळी.

**प्राचीनामलक**–न., वनस्पति० आमलकीभेदः, पानीयामलकम् इति लोके ( ड. चसू. २७.१४६; सुसू. ४६.१५८; ध. १.२१८ ) पाणआवळी, रायआवळा.

**प्राचीनारङ्ग**–न., वनस्पति० प्राचीनामलकम् ( ध. १.२१८ ) पाणआवळी, रायआवळा.

**प्राचेतस्**–पु., प्रजापति० दक्षः ( असंनि. १.५ ) प्रजापती, दक्ष.

**प्राच्य**–पु., पौरस्त्यदेश० ( चवि. १.१७ ) तत्रत्यो जनो वा, मत्स्यसात्म्या इमे जनाः ( चचि. ३०. ३१७) प्राच्यदेशोद्भवा नद्यः अर्शांसि कुर्वते (अहृसू. ५.११) पूर्व देशातील लोक; हे विशेष क्षारसेवी असतात. पूर्वेकडे वाहाणाऱ्या नद्या मूळव्याध करतात.

**प्राजन**–न., शस्त्र० सूचिः प्रवीयते क्षिप्यते सन्धानार्थमिति प्राजनं सूचिरित्यर्थः, सूचिः ( असंनि. २.९ ) सुई.

**प्राजापत्य**–न., नक्षत्र० रोहिणी (इन्दु.) ( असंउ. ५ ) रोहणीनक्षत्र.
ब्राह्मो वैदिकविधि० ( असंउ. १ ) प्रजापती देवता असलेला वैदिक विधि.

**–सत्त्व**–न., शुध्दसत्त्वस्य भेदः, शुद्धसत्त्वस्याष्टमो भेदः, प्रजावन्तं, क्रियावन्तं, धर्मशीलं जगत्प्रियमनीर्ष्यमशठं शुचिं प्राजापत्यसत्त्वं विद्यात् ( कासू. २८ ) धर्मशील. शुद्धसत्त्व पुरुषाचा प्राजापत्यसत्त्व हा आठवा भेद आहे. असा पुरुष प्रजावन्त, कर्मशील, धार्मिक वृत्तीचा, जगाला प्रिय, मत्सर न करणारा व सरळ वृत्तीचा असतो. पवित्र आचरणी हे प्राजापत्य सत्त्व लक्षण आहे.

**प्राज्य**–वि., विपुलं, प्रभूतम् ( असंशा. ८.१६ ) पुष्कळ, विपुल.

**प्राञ्जल**–वि., सरलम् ( सुशा. १०.१० ) सरळ.

**प्राण**–पु., वात० ( चसू. १२.८; चचि. २८.२३४; सुनि. १.१३; असंसू. २०.४ ) पञ्चवातभेदेष्वेकः, जीविताऽऽधारः ( चसू. २९.३ ) प्राणिति श्वसिति जीवति सत्वं बहुकालम् अनेनेति प्राणः । प्राणयति जीवयतीति प्राणः, तेन अग्निसोमवाय्वादीनां प्राणनस्वभावात् प्राणत्वं युक्तम् ( सुशा. ४.३ ) वक्त्रसंचारी वायुः ( सुशा. १.१७ ) तस्य स्थानानि– उरः कण्ठः शिरश्च; तत्कर्माणि–बुध्दीन्द्रियहृदयमनोधमनीधारणम् ( असंसू. २०.४ ) ष्ठीवनक्षवथूद्गारनिःश्वासान्नप्रवेशनानि (अहृसू. १२.४ ) दुष्टप्राणवायुकर्माणि हिक्काश्वासादिरोगाः ( सुनि. १.१३-१४ ) वायूच्या पाच प्रकारांपैकी प्राणवायु हा एक प्रकार. जीवनाचा आधार. श्वसनाधारे प्राण्याचे शरीर जगविणारा म्हणून प्राण, मुखप्रदेशात संचार करणारा वायु. **त्याची स्थाने**— उर, कंठ, शिर.
**त्याची निरोगावस्थेतील कामे**—बुद्धि, इंद्रिये, हृदय, मन, धमनी, धारण करणे. थुंकी, शिंक, ढेकर, निःश्वास, अन्नप्रवेश करणे. **बिघडलेल्या प्राण वायूची कर्मे**—उचकी, श्वासादिरोग निर्माण करणे.
बलम् ( सुसू. ४६.५०७ ) भारहरणादिशक्तिः ( सुसू. ४६.३७३-७४ ) वजन वहाणे वगैरेची शक्ति.
प्राणाधिष्ठानं हृदयादि ( सुसू. ५.१८ ) प्राणाचे ठिकाण, हृदय वगैरे.
अग्निसोमादयः प्राणाः ( सुसू. ५.२४ ) अग्निः सोमो वायुः सत्त्वं रजस्तमः पञ्चेन्द्रियाणि भूतात्मेति प्राणाः ( ड. सुसू. ५.२४ ) अग्नि, सोम, वायु, सत्त्व, रज, तम, पाच इंद्रिये. भूतात्मा असे १२ प्राण.

**–काम**–वि., प्राणान्कामयतेऽसौ ( चचि. १.(२)-३ ) आयुष्कामः ( सुचि. २७.१२ ) दीर्घायुष्याची इच्छा करणारा.

**–कामीय**–वि., प्राणकामशब्दमधिकृत्य कृतो ( रसायनपादः ) ( चचि. १.१ ) अध्यायाचे नाव.

**–क्षय**–पु., बलक्षयः, प्राण एव बलं, तस्य क्षयः ( सुचि. ५.६ ) उत्साहापचयलक्षणो बलक्षयः ( ड. सुसू. ३३.५-६ ) बलाचा क्षय. प्राण हाच बळ त्याचा क्षय, उत्साहाचा क्षय.

**–घ्न**–वि., जीवितविनाशकम् ( सुसू. ४०.५ ) जीवितनाशक.

**–जनन**–वि., प्राणवर्धनः ( सुसू. ४६.३५९ ) जीवनवर्धक, प्राणवर्धक.

**–द**–पु., वनस्पति० जीवकः ( ध. १.१२३ ) जीवक, अष्टवर्गांपैकी एक.
वि., प्राणान् ददातीति, प्राणदम् ( क्षीरम् ) ( सुसू. ४५.४८ ) प्राण देणारे ( दूध ).

(–दा)–स्त्री., वनस्पति० हरीतकी (ध. १.२०५) हिरडा.
**महाराष्ट्री** (रापरि. ४.१३) मराठी.
**जलपिप्पली** (असंउ. ४९) जलपिंपळी.
**ऋद्धिः** (रा. ५.१८७) ऋद्धि.

**–धरा**–स्त्री., त्वक्० षट्सु त्वक्षु एकेयम् क्रमतः षष्ठी त्वक् (असंशा. ५.२६)
सहा त्वचांपैकी क्रमाने सहावी त्वचा.

**–नाथ**–पु., पारदयोग० **पारदधत्तूरभार्गीत्रिफला-भृङ्गराजादिसाधितोऽयं चतुर्गुञ्जाप्रमाणासेवितो राजयक्ष्मनाशकः** (र. १४.५६-५९)
सिद्धौषधाचे नाव. पाऱ्याचा योग. पारा, धोतरा, भारंगमूळ, त्रिफळा इत्यादि घटित योग. क्षयनाशक. प्रमाण– ४ गुंजा.

**–पति**–पु., **प्राणान्पाति रक्षतीति, राज्ञः प्राणाचार्यो वैद्यः** (चक्र. चवि. ६.१९)
प्राणाचे रक्षण करणारा वैद्य, राजवैद्य.

**–प्रकोप**–पु., **प्राणस्य अतिवृद्धिः, क्षोभः, प्राणो रौक्ष्य-व्यायामलङ्घनैरत्याहाराभिघाताध्ववेगोदीरणधारणैः प्रकुपितश्चक्षुरादीनामुपघातं,पीनसार्दिततृड्कासश्वासा-दिबहून्व्याधीन् प्रवर्तयेत्** (असंनि. १६.२१-२२)
प्राणाची अतिवाढ होऊन होणारा क्षोभ. रूक्ष पदार्थ, अति व्यायाम, अति लंघन, अति आहार घेणे, अभिघात, भराभर फार लांब मार्ग चालणे, वेगांचे जोराने उदीरण किंवा धारण करणे इत्यादी कारणांनी प्रकुपित झालेला प्राणवायु डोळे इत्यादी इंद्रियांना आघात करतो व पडसे, अर्दित, तहान, खोकला, श्वास इत्यादी बरेच रोग निर्माण करतो.

**–प्रणुत्**–वि., **प्राणनाशकः** (सुनि. १६.६२)
प्राणनाशक.

**–प्रत्यानयन**–न., **प्राणस्थापना** (असंउ. १)
प्राणस्थापना. जाऊ पहाणारे प्राण स्वस्थानी परत आणणे.

**–भृत्**–वि., **प्राणान् बिभर्ति धारयति इति प्राणभृत् प्राणी, चैतन्ययुक्तः** (चनि. १.३५)
प्राणी. चैतन्ययुक्त प्राणी.

**–यात्रा**–स्त्री., **जीवितयात्रा प्राणोपलक्षितशरीर-निर्वाहः** (सुसू. १.४) आयुष्यक्रमण.

**–वत्**–वि., **बलवान्, शक्तियुक्तः** (सुचि. ६.७)
बलवान. शक्तिमान.

**–वर्धन**–न., **प्राणानां वर्धनम्, जीवितवर्धनम्** (चसू. ३०.१५) प्राणवर्धक, आयुष्यवर्धक.

**–वह-स्रोतस्**–न., शारीर० **प्राणसंज्ञकवातवहस्रोतः,** (चवि. ५.८) **तत्संख्या द्वे; तन्मूलस्थानम्–हृदयम्; तद्वहनस्थानानि–रसवाहिन्यश्च प्राणवाहि-न्यश्च, धमन्यः; तद्विद्धलक्षणानि–क्रोशनविनमन-मोहनभ्रमणवेपनानि मरणं वा** (सुशा. ९.१२) **अतिसृष्टमतिबद्धं कुपितमभीक्ष्णमल्पाल्पं सशब्द-शूलमुच्छ्वसन्तं दृष्ट्वा प्राणवहस्रोतोदुष्टिर्ज्ञेया** (चवि. ५.८)
प्राणवायु वाहणारे स्रोतस. ही स्रोतसे दोन आहेत. त्यांचे मुख्य मूलस्थान हृदय. प्राणवायुसंचाराची स्थाने–रसवाही आणि प्राणवाही धमन्या, त्या स्रोत-सांवर आघात झाल्याची चिन्हे – आक्रोश, वाकणे, ज्ञाननाश, चक्रावर घातल्याप्रमाणे घेरी येणे, कापणे, मरण इत्यादी. श्वासोच्छ्वास संख्या वाढणे, श्वास अतिशय अडणे, तो कुपित होऊन वरचेवर उथळ थोडा थोडा, शब्दयुक्त, शूलयुक्त व मधूनच दीर्घश्वास टाकल्यासारखा आहे असे दिसले कीं प्राणवह स्रोतसाची दुष्टि जाणावी.

**–वहा**–स्त्री., शारीर० **हृदयाश्रिता धमनी प्राणवातस्य वाहिनी** (सुशा. ४.३१)
हृदयाश्रित धमनी प्राणवात वाहाणारी आहे.

**–वायु**–पु., वातभेद० **प्राणः** (चचि. २८.६)
वायूचा प्रकार.

**–वाहिन्**–वि., शारीर० **प्राणवहम् (स्रोतः)** (चवि. ५.१०) प्राणवाही स्रोतस.

**–वाहिस्रोतस्**–न., शारीर० **प्राणवहस्रोतः** (चचि. १७.१७) प्राणवाही स्रोतस.

**–विलोमता**–स्त्री., लक्षण० **प्राणवायोर्विपरीतगमनम्** (इन्दु. असंनि. ४.५)
प्राणवायूची नेहमीपेक्षा विरुद्ध मार्गाची गती.

**–संशय**–पु., **जीवितसंशयः जीवितस्य हानिः क्षयो वा संकटमूलकः** (सुचि. २८.२०)
जीविताबद्दल धोका.

**–हारक**–न., वनस्पति० **वत्सनाभः** (ध. ७.१२८)
बचनाग.

**प्राणाचार्य**–पु., **आयुर्वेदशास्त्रपारगः शीलवान्, मतिमान्, गुरुवत्पूज्यो वैद्यः** (चचि. १(४).५१)
आयुर्वेदशास्त्रनिष्णात. शीलवान, बुद्धिमान, गुरू-प्रमाणे पूज्य वैद्य.

**प्राणातिपात**–पु., प्राणोत्क्रमणम् ( अहृसू. १२.४२ )
प्राण जाणे, मृत्यु येणे.

**प्राणानुबन्ध**–पु., बलानुबन्धः बलाविच्छेदः ( चशा. ३.१२ )
बलाचा अनुबंध, बल कमी न होणे.

**प्राणापान**–पु., उच्छ्वासनिःश्वासौ ( चसि. ९.४ )
श्वासोच्छ्वास.

**प्राणाबाध**–पु., लक्षण० प्राणपीडा ( असंशा. ७.२८ )
प्राणपीडा.

**प्राणाभिसर**–पु., सुवैद्यः यः प्राणान् गच्छतो व्यावर्तयतीति ( चसू. ९.१८ ) योऽसौ कुलीनः पर्यवदातश्रुतो दृष्टकर्मा शुचिर्दक्षो जितहस्तः सर्वोपकरणवान् युक्तसर्वेन्द्रियः प्रकृतिज्ञः प्रतिपत्तिज्ञश्च, तथा च यः शरीराभिनिर्वृत्तिज्ञानादौ निःसंशयः सुखसाध्यादिव्याध्यवस्थानां व्याधीनां च निदानादिविज्ञाने विगतशङ्कस्त्रिविधायुर्वेदसूत्रादेः प्रवक्ता, मूलफल-स्नेह-लवण-क्षीरिवृक्ष-मूत्र-पञ्चकर्माश्रयौषधानां प्रयोक्ता, विज्ञातस्वस्थवृत्तविहितभोजनपानादिनियमो बहुविधविधानयुक्तेषु स्नेहाद्युपचारेषु च कुशलः, शिरोरोग-विद्रधिशोफादिनानास्थानगतक्षुद्ररोगाणां लङ्घनाद्युपक्रमाणां संतर्पणापतर्पणशोणितादिजानां व्याधीनां ज्ञाता चिकित्सकश्च, तथा चाऽवगतहिताहितस्वप्नाऽऽहारदूतादिज्ञानः, आसवक्वाथादिसिद्धौ दक्षो धात्वाश्रयाणां रोगाणां सौषधसंग्रहाणां दशप्राणायतनानां च ज्ञाता कृत्स्नतन्त्रस्य ग्रहणधारणविज्ञानप्रयोगकर्मकार्यकालकर्तृकरणकुशलः सर्वप्राणिषु संपादितमित्रभावश्च; एतादृशो वैद्यः प्राणाभिसर उच्यते । एतद्गुणविपरीतस्तु रोगाभिसरः ( चसू. २९.७ )
प्राणाभिसर. चांगला वैद्य. जाण्याच्या बेतात असलेल्या प्राणांना परतवणारा. जो वैद्य चांगल्या कुलात जन्माला आला आहे. ज्याने सुयोग्य गुरूजवळून पाठ-धडे घेतले आहेत, ज्याने सर्व चिकित्सोपयोगी कर्मे स्वतः पाहिली आहेत, जो शुचि, कर्म करण्यात चतुर, यशस्वी हात असलेला, सर्व उपकरणे ( साधने ) असलेला, ज्याला सर्व इंद्रिये व अवयव आहेत, ( कोणतेही व्यंग नाही ), प्रकृति जाणणारा; चिकित्सा आणि व्यवहार यातील अडचणी समजलेला, शरीर व शारीरक्रियादि ज्ञानाबद्दल संपूर्ण ज्ञान झालेला, सुखसाध्य, याप्य, असाध्य या व्याधींच्या निदानादि ज्ञानाबद्दल शंका नसणारा; हेतु, लिंग आणि औषधिज्ञान या त्रिविध आयुर्वेद-सिद्धांताबाबत अधिकारवाणीने बोलणारा; मूळ, फळ, स्नेह, लवण, क्षीरीवृक्ष, मूत्र पंचकर्मोपयोगी औषधांचा ज्ञाता व योजक; स्वस्थवृत्त जाणणारा; भोजन, पान वगैरेबाबत नियम जाणणारा; स्नेहस्वेदादी उपचाराबाबतचे सर्व प्रकारचे नियम समजून क्रिया करणारा; शिरोरोग, विद्रधि, शोफ, आदी अनेक ठिकाणी होणाऱ्या व्याधींना व क्षुद्र रोगांना जाणून उपचार करणारा; त्याप्रमाणे हित, अहित, स्वप्ने, आहार, दूतादिकांचे ज्ञान असणारा; आसवे, काढे, आदि सिद्धौषधींचा निर्माता–ज्ञाता; धातूंच्या आश्रयाने होणाऱ्या रोगांचा ज्ञाता; औषधिसमुदाय, दहा प्रकारच्या प्राणाची ठिकाणे जाणणारा; सर्व तंत्राच्या ग्रहण, धारण, विज्ञान, प्रयोग, कर्म, कार्यकाल व प्रत्यक्ष कृतीमध्ये तरबेज असणारा; सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी मित्रभाव ठेवणारा; अशा तऱ्हेचा वैद्य प्राणाभिसर ह्या पदवीला योग्य आहे. याच्या विरुद्ध गुणाचे रोग पसरविणारे आहेत.

**प्राणायतन**–न., प्राणस्याऽऽयतनं स्थानम्, यस्मिन्नायतने प्राणाः प्रतिष्ठिताः ( चशा. ७.९ ) तानि संख्यया दश वर्तन्ते । शङ्खौ हृदयं बस्तिः शिरः कण्ठो रक्तं शुक्रमोजो गुदं च, येषामुपघाते प्राणोपघातो भवति ( चसू. २९.१-३ ) प्राणानामग्नीषोमादीनां स्थानम् ( सुसू. १५.२१ )
प्राणायतन म्हणजे शरीर. ज्यामध्ये प्राणाचे अस्तित्व आहे ते. ती ठिकाणे दहा– ( १।२ ) शंख ( दोन्ही बाजूची कानशिले ) ( ३ ) हृदय ( ४ ) बस्ती ( ५ ) शिर ( ६ ) कंठ ( ७ ) रक्त ( ८ ) शुक्र ( ९ ) ओज ( १० ) गुद. ज्यांच्यावर आघात झाला असता प्राणनाश होतो व अग्नि, सोम इत्यादी प्राणांचे स्थान असलेले.

**प्राणायतनसमुत्थ**–वि., प्राणायतनेभ्यः समुत्पन्नः ( चसू.,२८.७ ) प्राणाच्या स्थानात उत्पन्न झालेला.

**प्राणायाम**–पु., प्राणवायोरवरोधनम् ' यमनियमासनप्राणायाम... ' इति योगसूत्रोक्तानामष्टयोगाङ्गानामेकम् यच्च ' प्रच्छर्दनविधारणाभ्यां वा प्राणस्य ' इत्यनेन योगसूत्रेण विवृतमुपलभ्यते ( सुसू. २६.१३ ) वायोर्निरोधः त्रिविधोऽयं रेचकपूरक-कुंभक-भेदात् ( ड. सुउ. ५०.१६ )

प्राणायाम. रेचक, पूरक आणि कुंभक. यमनियमादि अष्टांगयोगापैकी एक.

**प्राणावलम्बन**-(परिव०) न., **प्राणधारणम्** ( सुनि. १.१३ ) प्राणधारण.

**प्राणाश्रय**-पु., **प्राणाधारः** ( चचि. २६.४ ) प्राणाधार.

**प्राणिन्**-पु., **प्राणसहितः पुरुषः** ( चशा. १.७७ ) जिवंत प्राणी.
**आत्मा** ( चशा. १.७७ ) आत्मा.
**जीवो जन्तुर्वा** ( चसू. १.४८ ) जिवंत प्राणी.

**( प्राणि )-मातृ**-स्त्री., **वनस्पति० पुत्रदा** ( रापरि. ४.२७ ) पुत्रदायक एक वनस्पती.

**प्राणेश्वर**-पु., **पारदयोग० गंधकाभ्रसूत्रत्रिफलाव्योषादि-साधितोऽयं सर्वाङ्गसुन्दरः** ( र. १८.८४-९० )
**अभिन्यासाग्निमान्द्यग्रहणीपाण्डुरोगनाशकः** ( र. १२.१२५-२६ )
सिद्धौषधीचे नाव. पारा, गंधक, अभ्रकादि युक्त. अभिन्यास, अग्निमांद्य, ग्रहणी, पांडुरोग नाशक.

**प्राणोपरोध**-पु., **प्राणस्याऽवरोधः** ( चचि. १७.१८ )
**मरणम्, बलक्षय इत्यन्ये** ( चक्र. चसि. २.९ )
**प्राणायामः** ( सुउ. १९.७ )
प्राणवायूच्या गतीला अवरोध. मरण, बलनाश किंवा प्राणायाम.

**-सपत्न**-पु., **प्राणिशत्रुः (व्याधिः)** (चचि.३.५) रोग.
**ज्वरः** ( चचि. ३.५-९ ) ज्वर.

**प्रातराश**-पु. **प्रातर्भोजनम्, दिवा भोजनम्** ( चचि. १५.२३७ )
सकाळचे भोजन. दिवसाचे भोजन.

**प्रातिका**-स्त्री., **वनस्पति०** जपा ( रापरि. १०.३९ ) जास्वंद.

**प्रातिलोम्य**-वि., **विपर्ययः, वैपरीत्यम् विपरीतम् इति डल्हणोक्ते भावप्रधाननिर्देशो बोध्यः तेन विपरीतं वैपरीत्यमिति प्राप्नोति** ( ड. सुउ. ६५.२१ )
विपरीतता. उलट.

**प्रातुद**-वि., **प्रतुदस्य ( पक्षिणः ) इदमिति प्रातुदम् ( मांसम् )** ( अहसू. ६.५४ ) प्रतुद प्राण्याचे मांस.

**प्राथमकल्पिक**-वि., **प्रथमे श्रेष्ठे कल्पे पक्षे भवतीति प्राथमकल्पिकः, श्रेष्ठः** ( चक्र. चसू. १३.२६ )
पहिल्या पंधरवड्यात झालेले ते श्रेष्ठ.

**प्रादक्षिण्य**-न., **आनुकूल्यम्** (चसू. १५.७) अनुकूलता.

**प्रादुर्भाव**-पु., **उद्भवः** ( असंसू. ८.११ ) उत्पत्ति.

**प्रादेश**-पु., **मान० विस्तृतयोरङ्गुष्ठतर्जन्योरवकाशमानम्** ( र. १०.३४-३९ )
प्रमाण. रुंद करून ठेवलेल्या अंगठा आणि तर्जनी यांच्या मधील अंतर.

**प्राधान्य**-न., **आधिक्यम्** ( चनि. १.१२(१) )
अधिकपणा, महत्व.

**-संग्रह**-पु., **श्रेष्ठद्रव्यसंग्रहः, मूलविरेचनेऽरुणाभं त्रिवृन्मूलं श्रेष्ठम्, फलेषु हरीतकी, त्वक्षु तिल्वकः, तैलेष्वेरण्डजं तैलम्, स्वरसे कारवेल्लिका, पयःसु सुधापयः** ( सुसू. ४४.३-४ )
**द्र० ' अग्र्यसंग्रह '**
त्या त्या कार्यासाठी उत्कृष्ट कार्यकारी द्रव्यांची जमवा-जमव असणे याला श्रेष्ठ द्रव्यसंग्रह म्हणतात. उदा० विरेचनासाठी मूळ वापरावयाचे तर निशोत्तर, फळ वापरावयाचे तर हिरडा, साल जर वापरावयाची तर तिल्वकाची साल, तेल वापरावयाचे तर एरंडेल तेल, स्वरस वापरणे असेल तेव्हा कारल्याचा पानांचा रस, वनस्पतीचा चीक वापरण्याच्या बाबतीत निवडुं-गाचा चीक. अशी ही द्रव्ये श्रेष्ठ होत.

**प्राप्त**-वि., **युक्तम्** ( सुचि. १.३३-३४; सुचि. २.३७ )
मिळालेले.

**-कारिन्**-वि., **युक्तकारी** ( सुशा. ४.८६ )
योग्य वेळी योग्य ते करणे.

**प्राप्ति**-स्त्री., **भेषजस्य व्याधि शरीराद्यपेक्षया सम्यग्योजना** ( चसू. १.१२१ )
व्याधी व शरिराला अनुसरून औषधाची योग्य योजना.

**प्रायश्चित्त**-न., **पापपरिमार्जनी क्रिया** ( चनि. ७.१६; चसू. ३०.२१ ) **प्राक्तनकर्मोपशमार्थं स्मृत्युक्त-चान्द्रायणादिव्रतानुष्ठानम्** ( सुसू. ६.२० )
पापे किंवा दुष्कृत्ये नाहीसे करणारी क्रिया. प्राक्तन कर्मांचे शमन व्हावे म्हणून स्मृतीने सांगितलेले चांद्रायणादि व्रतांचे अनुष्ठान.
**भेषजम्** ( चचि. १.३ ) औषध.
**चिकित्सा** ( सुसू. ३.२६ ) चिकित्सा, उपचार.

**प्रायोगिकी**-वि., **नित्यप्रयोज्या ( धूमवर्तिः )** ( चसू. ५.२५ )
नेहमी उपयोगात आणण्याची धूमवर्ती.

**प्रार्थना**-स्त्री., **ईप्सितार्थयाञ्चा** (चशा. ४.१९) **अभि-लाषा** ( सुसू. १५.९ )
प्रार्थना. इष्ट हेतुसिद्धीसाठी मागणी, इच्छा.

**प्रालेय**–न., हिमम् ( असंचि. ९ ) थंड, बर्फ.
**प्रावरण**–न., आच्छादनम् ( सुचि. ३२.६ ) पांघरुण.
**प्रावार**–पु., गुरुप्रावरणं कम्बलादि ( चसू. ६.१५ )
जड पांघरुण ( कांबळे घोंगडी इ० ).
**प्रावृष**–स्त्री., ऋतु० प्रावृडिति प्रथमः प्रवृष्टेः कालः, वर्षा ( चवि. ८.१२५ ) आषाढश्रावणौ मासौ प्रावृड्घटकौ ( चक्र. चशि. ६.५; सुसू. ६.१० )
पावसाळ्याचा आरंभ काल. वर्षाऋतु, आषाढ-श्रावण.
**प्रावृषेण्य**–पु., वनस्पति० कुटजः ( रा.९.१९ ) कुडा.
कदम्बः ( रा. ९.१७२ ) कळंब.
( **प्रावृषेण्या** )–स्त्री., वनस्पति० पुनर्नवा ( रा. ५.४०७ ) पुनर्नवा.
कपिकच्छूः ( रा. ३.२०१ ) खाजकुइली.
**प्रावृष्य**–पु., वनस्पति० कदम्बः (ध. ४.१०५) कळंब.
कुटजः ( रा. ९.१८ ) कुडा.
विकण्टकः ( रापरि. ११.२० )
सराटा ( गोखरूचा प्रकार ).
**प्राश**–पु., प्राश्यते इति प्राशः, आहारः (सुचि. ४.५ ) गुलकंद किंवा खव्यासारखा औषधीयोग ( च्यवनप्राश इ० )
**प्रासह**–वि. प्रसहस्येदमिति प्रासहम् ( मांसम् ) ( अहृसू. ६.५४ ) प्रसह प्राण्याचे मांस.
**प्रासाद**–पु., गृह० हर्म्यम्, देवतानरेन्द्राणामधिष्ठानम् (सुसू. २८.१८-१९) देव, वरिष्ठ लोक रहाण्याचे ठिकाण.
प्रसादभागः, स्वच्छो भागः (र. २३.७२-७४ ) औषधीद्रव्य पाण्यात वाटून वा मिसळून स्थिर ठेवल्यानंतर वर असलेला स्वच्छ द्रव.
**प्रास्तृतयोगीया**–वि., अध्यायसंज्ञा० प्रसृतोपलक्षितान् योगानधिकृत्य कृता सिद्धिः, तेन (चसि. ८.१) अध्यायाचे नाव.
**प्रास्रवण**–वि., पर्वताश्रितम् उच्चप्रदेशप्रस्रवज्जलस्थानम् तत्सम्बन्धि ( जलम् ) (सुसू. ४५.८) द्र० 'जल' पर्वताच्या उंचभागातून येणारा वाहत्या पाण्याचा झरा.
**प्रियंवदा**–स्त्री., वनस्पति० जाती ( ध. ५.१३७ ) जाई.
**प्रिय**–पु., वनस्पति० जीवकः ( रा. ५.१५४ )
जीवक, अष्टवर्गापैकी एक.
उदकीर्यः करञ्ज० ( ध. ५.१०९ ) करंज.
( **प्रिया** )–वि., मनोनुकूला ( सुउ. ५५.३३ )
मनाला आवडणारी.
स्त्री., वनस्पति० वार्षिकी ( ध. ५.१३६ )
तीन पुटांची, त्रिकोणी आकाराची, वर्षाऋतूत होणारी, भुंग्यांना आकर्षक सुगंधी वनस्पती.
प्रियङ्गुः ( ध. ३.१६ ) गव्हला.
मल्लिका ( रा. १०.२२५ ) मोगरी.
आसुत० सुरा ( रा. १४.३०१ ) दारू.
–**जीव**–पु. वनस्पति० टिण्टुकः ( ध. १.११४ ) टेंटु.
–**दर्शन**–वि., प्रियं दर्शनं यस्य सः, सुन्दरः ( सुशा, ४.७२. ) दिसण्यात सुरेख, सुंदर, देखणा.
वनस्पति० राजादनः ( ध. ५.९१. ) खिरणी.
–**वल्ली**–स्त्री., वनस्पति० प्रियङ्गुः ( ध. ३०.१६ ) गव्हला.
–**वादिन्**–पु. पक्षि० चातकः ( चइ. १२.७५ )
चातकपक्षी.
–**शत**–न. प्रियाणां चाटूक्तीनां बालक्रीडनकदानादीनां च शतम् ( सुशा. १०.४६ )
आवडत्या व करमणुकीच्या गोष्टी सांगणे, अपाय करणार नाहीत अशी सुंदर खेळणी मुलाना रमविण्यासाठी देणे वगैरे शेकडो गोष्टी.
–**शाल**–पु. वनस्पति० किराततिक्तः ( ध. १.३४ )
काडेकिराइत.
–**शालक**–पु. वनस्पति० सर्जकः (ध. ५.१२५) राळ.
**प्रियक**–पु. वनस्पति० सर्जकः ( ध. ५.१२५; सुउ. ४७.६१ )
राळेच्या वृक्षासारखा एक वृक्ष.
प्राणि० ललितकः, अजगरप्रायः श्लक्ष्णो दीर्घः ( ड. सुचि. ८.३७ )
अजगराप्रमाणे गुळगुळीत व लांब प्राणी ( याच्या मांसाचे पोटिस वातकफजन्य वेदनाशामक आहे )
**प्रियङ्करी**–स्त्री., वनस्पति० लक्ष्मणा ( रा. ४.१२५ )
कंद असलेली पुत्रदायक वनस्पती.
जीवन्तीभेदः बृहज्जीवन्ती ( रा. ३.१७९ )
द्र० 'जीवन्ती' मोठी हरिण दोडी.
बृहती ( ध. १.९९ ) डोरली.
**प्रियङ्गु**–पु., स्वनामख्यातः सुगन्धिलता० ( चसू. ३.२६ ) कुधान्य० ( सुसू. ४६.२१ ) तैलयुक्तफल० ( सुसू. १४.३६ ) तृणधान्य० ( अहृसू. ६.१२ ) संधानीय-मूत्रविरजनीयपुरीषसंग्रहणीयशोणितस्थापनगणोक्तमेकं द्रव्यम्

( चसू. ४.९,१५,१८ ) धूमप्रयोगे एकं द्रव्यम् ( चसू. ५.२० ) तद्गुणाः– तिक्तो; मधुरकषायः ( चसू. २७.१७ ) शीतो; लघुः (च) रक्तप्रसादनः; संग्राही, शोषणः (च) पित्तघ्नो मोहदाहज्वरवान्ति-रक्तपित्तवक्त्रजाड्यघ्नः ( ध. ३.१६ ) श्यामाकसदृशगुणः ( चसू. २७.१७ ) हेमन्ते प्रियङ्गुलता पुष्पयुता भवति ( सुसू. ६ ) ( सुसू. ६.२२–२३ ) तस्य पुष्पमञ्जनार्थमुपयुज्यते
सुसू. १७.८-१० )

हिं.—फूलप्रियङ्गु.

**म.—गव्हला.**

गु.—घडला.

बं.—गन्धप्रियङ्गु.

सुगंधी वेल. तृणधान्य. ( कांग ) फळ तेलयुक्त असते. **गुण**—मोडलेले हाड सांधणारे, मूत्राचा रंग सुधारणारे, मळाला घट्टपणा आणणारे, रक्त थांबवणारे, धूम्रपानाच्या औषधात उपयुक्त, कडु, थंड, पचनास हलके, रक्तप्रसादक, द्रवशोषक, पित्तनाशक, मोह, दाह, ज्वर, वांती, रक्तपित्त, तोंडाचा जडपणा नाशक असून बहुतेक गुण कांग किंवा राळ्यासारखे आहेत. हेमंतऋतूत ह्या वेलीला फुले येतात. फुलाचा अंजनासाठी उपयोग होतो.

**कुरुक्षेत्रात्पूर्वदेश०** ( काखिल. २५.९ )
कुरुक्षेत्राच्या पूर्वेकडील देश.

**प्रियङ्गुका**–स्त्री., **वनस्पति०** **प्रियङ्गुः** ( सुउ. ४५.१९ )
गव्हला.

**प्रियाङ्ग्वादिगण**–पु. **द्रव्य०** ( सुसू. ३८.४५ )
**गणान्तर्गतौषधयः, प्रियङ्गुः पुष्पाञ्जनं, स्रोतोञ्जनं, रसाञ्जनं, भार्ङ्गी, पद्मकेसरं, मञ्जिष्ठाऽनन्ता, शाल्मली, मोचरसः समङ्गा, पुन्नागश्चन्दनं, धातकी; तद्गुणाः—पक्वातीसारनाशनः संधानीयः, पित्ते हितकरो व्रणरोपणश्च** ( अहसू. १५.३७-३९; सुसू. ३८.४५ )
प्रियंगु आदि द्रव्यांचा गण, त्यामधील द्रव्ये—गव्हला, पुष्पांजन, स्रोतोञ्जन, रसांजन, भारंगी, पद्मकेसर, मंजिष्ठ, अनंत, साव्वरी, मोचरस, लाजाळू, पुन्नाग, धायटी ही आहेत.
या गणाचे **गुण**—पक्वातीसारनाशन, भंगलेले हाड सांधणारा, पित्ताला हितकारक, व्रणरोपक.

**प्रियात्मज**–पु., **प्रतुदपक्षि०** **शतपत्रभृङ्गराजकोयष्टिजीवजीवकप्रभृतीनामन्यतमोऽयं पक्षी प्रतुदः**, द्र० ' प्रतुद ' ( चसू. २७.५० )
भक्ष्य टोचून खाणारा पक्षी. चकोर, सुतारपक्षी इत्यादींपैकी एक.

**प्रियाम्बु**–पु. **वनस्पति०** **आम्रः** ( रा. ११.३ ) आंबा.

**प्रियाल**–पु., **फल०** **श्रमहरगणे उदर्दप्रशमनगणे चैकं द्रव्यम्** ( चसू. ४.१६-१७ ) **चारः** ( सुसू. ४६.१५६ ) **मधुरोऽम्लः शीतो गुरुः; स्निग्धः** (चसू. १३.१० ); **वृष्यो; बल्यो, बृंहणः** ( चसू. २७.१५८ ); **वातपित्तघ्नः; पित्तकफवर्धनः** ( च ) **पित्तदाहघ्नः** ( ध. ५.७२ ); **क्षतक्षीणायास्य चूर्णं क्षीरेण सह दद्यात्** ( चचि. ११.३१ ); **सरक्ते पवने प्रदेहार्थमुपयुज्यते** ( चसू. ३.२१ ); **फलस्नेहः पित्तसंसृष्टे वायौ उपयोज्यः** (सुचि. ३१.५) **तन्मज्जा-मधुरा, वृष्या, पित्तानिलापहा** ( सुसू. ४६.२०५ )

हिं.— पियाल.

**म.—चारोळी, चार.**

गु.—चारोळी.

बं.—पिहाल.

ता.—चारप्परुप्पु.

फा.—नुकले, खाजा.

**चारोळी**—श्रमहरगण, उदर्दप्रशमनगण यांतील एक द्रव्य. **गुण**—मधुर, आंबट, शीत, गुरु, स्निग्ध, वृष्य, बल्य, बृंहण, वातपित्तनाशक, पित्तदाहनाशक, क्षतक्षीणाला दुधाबरोबर यांचे चूर्ण द्यावे. वातरक्तामध्ये लेपाकरिता उपयोग करतात. पित्तयुक्त वाताकरिता फळाचे तेल उपयुक्त. बी—गोड, शुक्रवर्धक, वातपित्तनाशक.

**(प्रियाला)**–स्त्री., **वनस्पति०** **द्राक्षा** ( ध. ५.५६ ) द्राक्ष.

**-तैल**–न., **प्रियालस्य तैलम् श्लेष्माभिवर्धनम्** ( चसू. २७.२९१ ) **शीतं, वातपित्तशमनं, सृष्टमूत्रमभिष्यन्द्यग्निसादनम्** ( सुसू. ४५.१२० ) **गुरु केश्यम्** ( ध. ६.१४२ )
चारोळीचे तेल. कफवर्धक आहे. शीत, वात, पित्तशामक, मूत्र उत्पन्न करणारे, अभिष्यंद, अग्निमांद्य करणारे पचायला जड, केसांना हितावह आहे.

**प्रीणन**–वि., **तृप्तिकरः, तर्पकः** ( चसू. १.१०७ )
तृप्ति करणारे तर्पक. तृप्ति.
न., **तृप्तिः** ( अहसू. ११.४; सुसू. १५.५ ) तृप्ती.

**प्रीति**–स्त्री., **मनःसुखम्** ( चवि. ४.८; सुचि. २६.३९ ) मनाचे समाधान.

**प्रेक्षण**–न., शारीर० **अक्षि, प्रेक्ष्यते दृश्यतेऽनेनेति प्रेक्षणं चक्षुः** ( सुउ. ४४.५ ) डोळे.

**–कूट**–पु., शारीर० **अक्षिकूटः** ( सुउ. ४४.५ ) डोळ्याची खोबण.

**प्रेङ्खा**–स्त्री., **दोला** ( सुचि. २४.९२ ) झोपाळा.

**प्रेङ्खोलन**–न., **दोलनम्, हिन्दोलनम्** ( सुनि. ८.३ ) झुलणे, हिंदोळे घेणे, झोपाळ्यावर झोके घेणे.

**प्रेत**–वि., **मृतम्** ( सुउ. ६०.१२ ) मृतशरीर, प्रेत.
पु., **पिशाच०** ( सुसू. ३१.३१ ) **भूताधिपति०** ( असंउ. ७ ) भूतांचा अधिपती.

**–गन्धिन्**–वि., लक्षण० **शटितमृतकगन्धतुल्यगन्धम्** ( ड. सुउ. ४०.१९ ) कुजलेल्या प्रेताच्या घाणीसारखी घाण असलेले.

**–रूप**–वि., लक्षण० **प्रेतसदृशो मृत इत्यर्थः** ( सुसू. ६१.१६ ) मेल्यासारखा, प्रेतासारखा, मेलेला.

**–लक्षण**–न., **मृतलक्षणम्** ( चइ. १.१९ ) मृतलक्षण.

**–लिङ्गानुरूपा**–वि., **प्रेतलक्षणसदृशी** ( चइ. १.७) प्रेतासारखे लक्षण.

**–सत्त्वनर**–(परिव०) पु., **राजससत्त्वभेदः, प्रेतस्वभावो नरः** ( सुशा. ४.९३-९४ ) प्रेत स्वभावाचा मनुष्य. राजसप्रकृतीचा प्रकार.

**प्रेत्यभाव**–पु., **मरणोत्तरं पुरुषस्याऽस्तित्वम्, पुनर्जन्म** ( चवि. ८.३७ ) पारलौकिक, पुनर्जन्म.

**प्रेय**–पु., **सूच्यग्रः** ( चक्र. चचि १३.१८८ ) सुईचे टोक.

**प्रेरण**–न., **चालना** ( चशा. ४.१२ ) चालना.
**आदिकारणम्** ( चसू. २०.५ ) सुरुवातीचे कारण.
**स्वकार्ये योजनम्** (चशा. १.७०) स्वकार्यात योजना.

**प्रेष्य**–पु., **शुश्रूषको दासः, उपस्थाता** ( चनि. २.२२ ) शुश्रूषा करणारा.

**प्रैतसत्व**–पु., **प्रेतसत्त्वाधिष्ठितनरः, राजससत्त्वस्यैकः प्रकारः, तल्लक्षणं–आहारकाममतिदुःखशीलाचारोपचारमसूयकमसंविभागितमतिलोलुपमकर्मशीलं प्रैतं विद्यात्** ( चशा. ४.३८ (५) ) राजससत्त्वाचा एक प्रकार. लक्षण— आहारावर सतत इच्छा असणारा, अति दुःखी स्वभाव, वागणे. व इतरांना दुखवण्याची वृत्ती. मत्सरी, दुसऱ्याचा वाटा न देणारा, अति लोलुप, काही ही चांगले न करणारा.

**प्रोक्षण**–न., उपक्रम० **सिञ्चनम्** (चचि. २९.१२८). शिंपडणे.
**विधिपूर्वकं मारणम्** ( चक्र. चचि. १९.४ ) विधीपूर्वक ठार मारणे.

**प्रोक्षित**–वि., **व्यञ्जनोदकप्रोक्षणपूर्वकम् अथर्वमन्त्रैरभिमन्त्रितम्** ( सुसू. ४६.४४८ ) अथर्वमंत्राने मंतरलेले.

**प्रोत**–वि., **आसक्तम्, दृढस्थापितम्** ( अहृसू. ७.४४ ) घट्ट बसविलेले.
पु., **कर्पटः** ( सुसू. ५.६ ) कापूस.

**प्रोद्वृत्तफलयोनि**–वि., **प्रकर्षेणोद्वृत्तं फलं रजोरूपं यस्या योनेः सा (स्त्री)** ( अरु. अहृसू. ३०.६ ) मळ मूत्र वेगांचे उत्सर्जन न करिता अडविल्यामुळे वाताने फेसाळ रजःस्राव होतो अशी दुष्ट योनि. गर्भाशय उलटून बाहेर येणे.

**प्रोन्नमन**–न , **प्रकर्षेणोन्नमनम् संपीडनानन्तरमेवोन्नमनम्** ( चचि. १२.१२ ) सूज दाबल्यानंतर पुन्हा तशीच होणे.

**प्रोष्ठपद**–पु., **भाद्रपदो मासः** ( काखिल. २३ ) भाद्रपद महिना.

**प्रौढा**–वि., **कामक्षमा ( स्त्री )** ( सुउ. ४७.४४ ) कामोपभोगाला समर्थ अशी पूर्ण वाढ झालेली ( स्त्री ).

**प्लक्ष**–पु., **क्षीरिवृक्ष०** ( सुउ. ४०.११९ ) **मूत्रसंग्रहणीयगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१५ ) **धूमपानप्रयोगे एकं द्रव्यम्** (चसू. ५.२२) **तद्गुणाः– कटुः, कषायः, शीतः, पित्तघ्नो रक्तपित्तमूर्च्छाश्रमप्रलापभ्रमनाशकः** ( ध. ५.८१ ) **क्षारागदे आवापार्थमुपयुज्यते** (सुक. ६.३) **तस्य त्वग्योनिरोगेष्वास्रावे चूर्णपिण्डं धारणार्थमुपयुज्यते** ( असंउ. ३९ ) **तत्पल्लवाः शाकत्वेनोपयुज्यन्ते** (चसू. २७.१०५) **तत्फलगुणाः– मधुरकषायाम्लः अम्लपाकी, पित्तश्लेष्महरोवातलो गुरुः** ( चसू. २७.१६४ )
हिं.—पाखर.
**म.—पिम्परी, पाकरी, बस्सरी, पारोसा पिंपळ.**
गु.—पीपर्य.
बं.—पाकुडगाछ.
ता.—इचि.
पिंपरी–मूत्रसंग्रहण करणारे गणातील एक द्रव्य,

धूमपानप्रयोगातील एक द्रव्य, **गुण**–तिखट, तुरट, शीत, पित्तनाशक, रक्तपित्त, मूर्च्छा, श्रम, बडबड, भ्रम नाहीसे करणारे आहे. क्षारागद या विषनाशक योगात वापरावयाकरिता उपयुक्त. त्वचेच्या व योनीच्या रोगात चूर्ण, चटणी गोळा लावण्यास व आत ठेवण्यास उपयुक्त. पाने भाजी म्हणून उपयुक्त. फळाचे गुण– गोड, तुरट, आंबट, पचनानंतर आंबट, कफपित्तहर, वातुळ, जड.

**प्लव**–पु., **जलचरपक्षि०** ( चसू. २७.४१; चचि. २६.२४६ ) **प्लवन्ते पानीये तरन्ति ये ते प्लवाः** ( सुसू. ४६.१०५-१०६ ) **तत्प्रकाराः– हंससारसकारण्डवकक्रौञ्चशरारिकाबलाकाद्याः सकादम्बा नन्दीमुखाः । तद्गुणाः–रसपाकयोः मधुरः, शीतः, उष्णः** ( रा. ) **स्निग्धो गुरुर्वातलः श्लेष्मलो बल्यः, सरः, शुक्रलः, पित्तघ्नः** ( रा. १७.२० ) **रक्तपित्तहरो वातघ्नः सृष्टमूत्रपुरीषश्च** ( सुसू. ४६.१०६ ) प्लव– जलचर पक्षि ( हंस, सारस, पाणकोंबडा इ० ). त्याचे **गुण**— रस आणि विपाक मधुर, शीत, उष्ण, स्निग्ध, गुरु, वातकारक, श्लेष्मकारक, बलकारक, सारक, शुक्रवर्धक, पित्तघ्न, रक्तपित्तहारक, लघ्वी मळ सुलासेवार करणारे.

**नौः** ( सुसू ३४.१८-१९ ) **नौका.**

न., **वनस्पति० कैवर्तमुस्तकम् परिपेलम्, कुष्ठे प्रलेपनार्थमुपयुक्तम्** (चचि. ७.१३०; ध. ३.५५; सुचि. ११.९ )

नागरमोथा, कुष्ठात लेपासाठी उपयुक्त.

**–ज**–पु., **पक्षि० प्रसेवकगलः चक्रः द्र० ' प्लव '** ( चसि. ३.१२ ) विशिष्ट प्रकारचा पक्षी.

**–दला**–स्त्री., **वनस्पति० मण्डूकपर्णी** ( र. १२.७४ ) उंदीरकानी.

**प्लवक**–पु., **वनस्पति० प्लक्षः** ( ध. ५.८१ ) पिंपरी.

**प्लवङ्ग**–पु., **वनस्पति० प्लक्षः** ( रा. ११.१२५ ) पिंपरी.

**प्लवन**–न. **गमनम्** ( चसू. २६.४१ ) **नद्यादितरणम्, स्नानम्, जलप्रतरणम्** (चवि. ६.१८; असंसू. १० ) पोहणे, स्नान, नदी, तलाव इत्यादिकांच्या पाण्यावर तरणे.

**प्लवोद्वाहिन्**–पु., **निर्विषसर्प०** ( असंउ. ४१ ) निर्विष साप.

**प्लीहन्**–पु., **शारीर० पञ्चदशकोष्ठाङ्गेष्वेकम्** ( चशा. ७.१० ); **तत्स्थानम्–हृदयस्याधो वामतश्च** ( सुशा. ४.३१ ) **रञ्जकपित्तस्य स्थानम्** ( सुसू. २१.१० ) **रक्तधरायाः कलायाः स्थानम्** ( सुशा. ४.१० ) **रक्तवहस्रोतोमूलम्** ( चवि. ५.८ ) **प्लीहाशोणितजः** ( सुशा. ४.२५ ) पांथरी, कौलू– १५ कोष्ठांगापैकी एक.

त्याचे स्थान– हृदयाच्या खाली, डावे बाजूला. रंजक–पित्ताचे स्थान, रक्तधराकलेचे स्थान, रक्तवह स्रोतसाचे मूळ, रक्तापासून बनलेले एक कोष्ठांग.

**रोग० प्लीहावृद्धिः** ( चसू. १८.२८; अहसू. ११.८ ) प्लीहावृद्धि, पांथरी वाढणे.

**(प्लीह)–घ्न**–पु., **वनस्पति० रोहिषः** ( इन्दु. असंउ. ४८ )

रगतरोडा, रक्तरोडा, रक्तरोहडा.

**–(घ्नी)**–स्त्री., **वनस्पति० रोहीतकः** ( र. २९.७१ )

रगतरोडा, रक्तरोहडा, रक्तरोडा.

**शरपुङ्खा** ( र. २९.७१ ) उन्हाळी.

**–ज**–वि., **प्लीह्नि जातः** ( चसू. १७.१०१ ) प्लीहेलाझालेले.

**–जठर**–पु., **रोग० प्लीहोदरम्** ( चचि. १३. ३८ ) प्लीहोदर.

**–दोष**–पु., **प्लीहाया दोषः रोगः** ( चसू. १९.३ ) प्लीहेचा रोग.

**–वृद्धि**–स्त्री., **रोग० कोष्ठानुसार्यन्तर्मार्गज एकः** ( चसू. ११.४९ )

**रक्तदोषजरोगेष्वेकः** ( चसू. २८.१२ )

**तत्संप्राप्तिः–यस्य कुपितो वातः प्लीहानमुध्दूय तिष्ठति तस्य पार्श्वं परितुदञ्छनैः प्लीहाऽभिवर्धते** (चसू.८.२८; अहसू.५.३४) **प्लीहवृद्धिर्द्विविधा-संक्षोभादिच्युतस्य प्लीह्नो वृद्धिरच्युतस्य वा शोणितवृद्ध्या वृद्धिः इति प्लीहवृद्धिद्वैविध्यम्** ( चचि. १३.३६ )

प्लीहावृद्धि. प्रकुपित वायु प्लीहेला स्वस्थानापासून च्युत करून त्याचे आजूबाजूला ठणका निर्माण करतो, त्याच वेळी प्लीहावृद्धि झाली असे म्हटले जाते. कोष्ठातील रक्तदोषज रोगापैकी एक रोग. प्लीहावृद्धिप्रकार २, एक जोराच्या हालचालीने, धक्क्याने ढळलेली. दुसरी रक्ताच्या वृद्धीने झालेली प्लीहेची वाढ, हाही प्लीहावृद्धीचा एक प्रकार आहे.

**–शत्रु**–पु., **वनस्पति० अश्वत्थफला** ( रा. ४.१३ ) हपुषा, शेरणी.

**प्लीहाभिवृद्धि**–स्त्री., **रोग० प्लीहवृद्धिः** ( चनि. ८.१८; सुनि. ७.१४-१६ ) प्लीहावृद्धि.

**प्लीहोदर**–न., रोग० उदरभेदः, विदाह्यभिष्यन्दिरतस्य रुग्णस्यात्यर्थं प्रदुष्टम् असृक् कफश्च प्लीहाभिवृद्धिं नाम प्लीहोदरं करोति। तल्लक्षणानि–मन्दज्वराग्निः, कफपित्तलिङ्गैरुपद्रुतः क्षीणबलोऽतिपाण्डुश्च भवति (सुनि. ७.१४-१५) तच्चिकित्सा–मणिबन्धं सकृन्नामयित्वा वामाङ्गुष्ठसमीरितां सिरामभितप्तेन शरेण दहेत् ( सुचि. ११.१६ )

प्लीहोदर–उदररोगाचा प्रकार. विदाही, अभिष्यन्दी पदार्थ फार खाणाऱ्याच्या, रक्ताचा व कफाचा बिघाड होऊन प्लीहोदर होते. त्यामध्ये मंदज्वर, अग्निमांद्य, कफपित्तचिन्हांचा उपद्रव, बलक्षीणता अतिपांडु हे विकार होतात. त्याची चिकित्सा–डाव्या हाताचे मनगट वाकवून आंगठ्याकडे येणाऱ्या शिरेला लागून बाणाच्या टोकाने डाग द्यावा.

**प्लुत**–वि., मिश्रितम् ( सुचि. ३७.४१ )
संमिश्रित, मिसळलेले.

**प्लुष्ट**–न., चतुर्विधाग्निदग्धेष्वेकम् इदं वैवर्ण्यातिदाहकरम् ( सुसू. १२.१६ )
अग्नीने भाजण्याच्या ४ प्रकारांपैकी एक प्रकार.

**प्लुत**–पु., कर्पटः वस्त्रपट्टिका, वस्त्रखण्डम् ( असंउ. १४; अहृसू. २७. ११ ) वस्त्र, पट्टी.
न., वस्त्रम्, ( सुशा. ८.८ ) शुक्लवस्त्रम् ( ड. सुचि. ३३.१४ ) पांढरे वस्त्र.

**प्लोष**–पु., रोग० चत्वारिंशत्–पित्तविकारेष्वेकः ( चसू. २०.१४ ) प्रादेशिकः स्वेदरहितः अग्न्यर्चिषेव दाहः प्लोषः ( असंसू २०. )
चाळीस पित्तविकारांपैकी एक. भाजल्यासारखी आग होणे.

## फ

**फक्क**–पु., बालरोग० पाङ्गुल्यम्, तत्सामान्यलक्षणम्–संवत्सरवयो बालः पादाभ्यां न गच्छति स फक्कः, बहुभोजिनः प्रायः प्रदुष्टग्रहणीका बालाः फक्कत्वमाप्नुवन्ति। तेषां भुक्तमपार्थकं भवति। मन्दाग्नित्वाद् द्रवोत्सर्गाच्च बाला बहुमूत्रपुरीषिणो भवन्ति। क्षीरजगर्भजव्याधिजभेदादेष त्रिविधः, तत्र क्षीरजलक्षणम्–श्लैष्मिकदुग्धाया धात्र्या दुष्टक्षीरपानाद् बालो बहुव्याधिपीडितः कृशश्च भवति। ततः पाङ्गुल्यमवाप्नोति। गर्भजलक्षणम्–गर्भिणीमातृको बालः स्तन्यस्य विनिवर्तनात् क्षीयते म्रियते वा, स गर्भपीडितः फक्कः, गर्भिण्याः स्तन्यपानाज्जातं फक्कत्वम्, पारिगर्भिकरोगाज्जातं च, व्याधिजलक्षणम्–निजागन्तुभिज्वरादिभिर्बालः क्लिश्यते तथा क्षीणमांसबलद्युतिः सुशुष्कस्फिग्बाहूरुर्महोदरशिरोमुखः पीताक्षो हृषिताङ्गो दृश्यमानास्थिपञ्जरः प्रम्लानाधरकायो नित्यमूत्रपुरीषकृच्छ्रिष्टाधरकायो वा पाणिजानुगमो वा भवति। दौर्बल्यान्मन्दचेष्टो मन्दत्वान्मक्षिकाकृमिकीटानां गम्य आसन्नमृत्युरुक् च भवति। विशीर्णहृष्टरोमा स्तब्धरोमा महानखो दुर्गन्धी मलिनः क्रोध्यतिविण्मूत्रदूषिकासिङ्घाणकमलोद्भवः सन् श्वसिति ताम्यति च ( काफक्कचि ) तत्र चिकित्सा–षट्पलामृतकल्याणकघृतानामन्यतमपानादनन्तरं सप्ताहापगमेन त्रिवृत्क्षीरेण शोधितकोष्ठः फक्करोगी शूद्रवर्जं ब्राह्मीघृतं पिबेत् ( काफक्कचि. )

पांगळेपणा. त्याची सामान्य लक्षणे– एक वर्ष वय झालेले मूल पायाने चालत नाही त्याला फक्क म्हणतात. ( या रोगाला व्यवहारात मुडदुस असे म्हणतात ). बहुधा ज्यांच्या ग्रहणी अवयवाला दुर्बलता असते अशा बालकांना हा विकार होण्याचा संभव असतो. अग्निमांद्यामुळे व द्रवधातु विसर्जन प्रवृत्तीमुळे मुलाला शौचाला व लघ्वीला अधिक होत असते. त्याचे क्षीरज, गर्भज व व्याधिज असे तीन भेद आहेत. दुधापासून झालेला मुडदुसविकार हा कफप्रधान आईचे दूध प्याल्याने निर्माण होतो. त्या दुग्धपानाने बालाला अनेक विकार होतात. कृशत्व येते, नंतर पांगळेपणा येतो.

गर्भज मुडदुसविकारात गर्भिणी माता आपल्या पहिल्या मुलाला दूध पाजते. त्या दुधाने हा विकार होतो. पारिगर्भिक रोगापासून सुद्धा हा विकार होतो.

व्याधिज मुडदुसात निज किंवा आगंतु ज्वराने मुलाला क्षीणत्व येते, त्यानंतर मांस व बल क्षीण होते. कुल्ले, बाहू, मांड्या, वाळतात. पोट मोठे होते. डोके आणि तोंड मोठे होते. डोळे पिंवळे होतात. अंगावर रोमांच उभे राहातात. अस्थिपंजर दिसतो. प्रामुख्याने शरीराचा कंबरेखालील भाग म्लान–मलूल होतो. नेहमी मल आणि मूत्र होत रहाते हात पाय लुळे होतात. दौर्बल्यामुळे हालचाल मंद होते. शरीराची हालचाल मंद झाल्यामुळे

शरिरावर माशा, कृमि, कीटक बसतात. ही अवस्था मृत्यु जवळ आल्याचे द्योतक मानतात. केस विशीर्ण होऊन गळतात. शरिरावरील केस ताठ उभे राहतात. नखे मोठी वाढतात. सर्व शरिराला, श्वासाला फार दुर्गंध येतो. संताप, मलमूत्रप्रवृत्ति, कान नाकातील मळ उत्पन्न होतात, श्वास लांबतो. डोळ्यापुढे अंधारी येते. ही लक्षणे (चिन्हे) व्याधीपासून झालेल्या मुडदुसाची आहेत.

त्याची चिकित्सा– षट्फलामृतघृत किंवा कल्याणकघृत यांपैकी कोणत्या तरी सिद्धतुपाचे पान करावे. सात दिवसानंतर निशोत्तरसिद्ध दुधाने कोष्ठशोधन करावे. नंतर शुद्रवर्णेतर बालकास ब्राह्मीघृत पाजावे.

**–चिकित्सित**–न., अध्यायसंज्ञा० ( काफक्कचि. ) अध्यायाचे नांव. मुलांच्या पांगळेपणाचे उपचार यात आहेत.

**–त्व**–न., **रोग० बालपाङ्गुल्यम्** ( काफक्कचि.) लहान मुलांचा पांगळेपणा.

**–दुग्धा**–स्त्री., **श्लैष्मिकदुग्धा** ( काफक्कचि. ) कफदुष्ट दुधाची, दूध असलेली स्त्री.

**–रथक**–न., **बालक्रीडनक० बालशकटः** ( काफक्कचि. ) पांगुळगाडा.

**फञ्जादिशाक**–न., शाकवर्ग० **फञ्जादिपञ्चकं, फञ्जिका जीवनी पद्मा तर्कारी चुचुकश्चेति पञ्चकं भेडा कुणजस्त्रिपुटश्चेत्येषां पत्राणां शाकम्, तद्गुणाः– दीपनं पाचनं रुच्यं बलवर्णविधायकं ग्राहि वृष्यं सुखावहं त्रिदोषशमनं च** ( रा. परि. ७.९५ ) फंजादिशाक म्हणजे फंजिका, जीवन्ती, पद्मा, तर्कारी चुचुक यांची भाजी. शिवाय भेडा, कुणज, त्रिपुट अशा तीन मिळून आठ प्रकारच्या पालेभाज्यांचा हा फंजादिशाकवर्ग होतो. त्याचे **गुण**—दीपन, पाचन, रुच्य, बलवर्णविधायक, ग्राही, वृष्य, सुखावह, त्रिदोषशामक आहे.

**फञ्जिका**–स्त्री., **वनस्पति० तद्गुणाः–ग्राहिणी दीपनी रुचिदायका वातामयहरा च** ( रापरि. ७.९४ ) फंजिका वनस्पती. ग्राही, दीपन, रुचिदायक, वाताचे रोग हरण करणारी आहे.

**फञ्जी**–स्त्री., शाक० **ब्राह्मणयष्टिका** ( चसू. २७.९८ ) फंजी, भारंगी.

**वनस्पति० भार्गी** ( सुसू. ३८.१८; सुउ. ४०.११३; ध. १.६८ ) भारंगी.

**वनजपत्रशाक० चुञ्च्वादिवर्गोक्ता, इयमल्पबला, भार्गी** ( सुसू. ४६.२५२ ) **बद्धमूत्रा सरा च** ( असंसू. ७.१२७ ) भारंगी. अल्प बलाची ही लघ्वी कमी करणारी व सारक.

**पाठभेदः, इयमतिसारशूलप्रणाशिनी पिच्छाबस्त्युपयुक्ता च** ( सुउ. ४०.११३ ) पहाडमूळप्रकार; अतीसार, उदरशूळ नाहीसा करणारा आहे. पिच्छावस्तीसाठी उपयोगी.

**वृद्धदारुभेदः जीर्णदारुः** ( रा. ३.१५७ ) देवदार.

**–चिल्यादिगण**–पु., **द्रव्यगण० फञ्जी–चिल्ली–कुतुम्बक-कुटिञ्जर–शण–शाल्मली–कर्बुदारादिः तद्गुणाः–मधुरो गुरुः रूक्षो विष्टम्भपूर्वकं जरणशीलः शीतवीर्यः पुरीषभेदनश्च** ( चसू. २७.९८-१०३ ) फंजी, चिल्ली, कुतुम्बक, कुटिंजर, शण, शाल्मली, कर्बुदारा वगैरेचा एक फंजीचिल्लीगण. हा गण– मधुर, गुरु, रूक्ष, विष्टंभ करून पचणारा, शीतवीर्याचा आहे. मलभेदन करणारा आहे.

**फटकी**–स्त्री., **खनिज० सौराष्ट्री, ईषत्पीतेयं गुरुस्निग्धा विषनाशिनी व्रणकुष्ठहरा च** ( र. ३.६७ ) तुरटी. किंचित पिवळ्या रंगाची, जड, स्निग्ध, विषनाशक व व्रण आणि कुष्ठहारक आहे.

**फटिका**–स्त्री., **खनिज० सौराष्ट्री** ( ध. ३.१०६ ) तुरटी.

**फण**–पु., **मर्म० फणा** ( असंशा. ७.२३ ) फणामर्म.

**(फणा)**–स्त्री., **मर्म० स्थानतः शिरोमर्म** ( सुशा. ६.६ ) **जातितः सिरामर्म** ( सुशा. ६.७ ) **सङ्ख्यया द्वे, मानम्–प्रत्येकमर्धाङ्गुलम्, घ्राणमार्गस्य द्वयोः पार्श्वयोरभ्यन्तरद्वारविवरसम्बद्धे फणे वैकल्यकरे च ते; तद्विद्धे गन्धाज्ञानम्** ( सुशा. ६.२७ ) फणानावाचे मर्म हे डोक्यातील मर्म आहे. प्रकाराने सिरामर्म आहे. संख्या दोन. प्रत्येक मर्म अर्धांगुळ आहे. घ्राणमार्गाच्या दोन्ही बाजूला स्त्रोतसांच्या पोकळीच्या तोंडाशी असलेले हे मर्म आहे. दोन्हीही बाजूला त्यावर आघात झाला तर गंधज्ञान नाहीसे होते, म्हणजे वास समजत नाही.

**(फणी)**–स्त्री., **वनस्पति० सर्पिणी** ( रापरि. ५.३९ ) नागचाफा.

**फणिज्ज**–पु., **वनस्पति० मरिचकः** ( अहसू. १५.३०; असंसू. १६.२४ ) अजवला.

**मरुबकः, तुलसी** ( र. २२.१५९ ) तुळस.

**फणिज्जक**-पु., वनस्पति० मरुबकः ( असंउ. २८ )
गुणाः–तिक्तः कटुः शीतो, रूक्षः ( उष्णः रा. )
रुच्यो मुखसौगन्ध्यकृत् कफघ्नः कृमिकुष्ठविड्बन्धा-
ध्मानशूलाग्निमान्द्यत्वग्दोषरक्तदोषघ्नो विषघ्नश्च
( ध. ४.५२ )
हिं.—मरुआ गोलातुलसी.
**म.—मरवा.**
गु.—मरवो.
बं,—गन्धतुलसी.
त.—मरुकोळुन्तु.
मरवा. **गुण**– कडु, तिखट, थंड, रूक्ष, रुचकर, तोंडाला सुगंधी आणणारा, कफ, कृमि, कुष्ठ, मळाचा, बंध, पोटफुगी, शूळ, अग्निमांद्य, त्वचा, रक्तदोष व विषनाशक आहे.

**फणिज्झ**-पु., वनस्पति० फणिज्झकः ( सुउ.११.५ )
पांढरा मरवा.
**निर्गुण्डी** ( सुउ. १.२५ ) निगडी, निर्गुंडी.

**फणिज्झक**-पु. वनस्पति० फणिज्जकः मरुबकः
( चक. १.२५; सुसू. ३८.१८ ) पांढरा मरवा.
**फाणिज इति लोके** ( सुसू. ४६.२२१ )
फाणिज एक सुगंधी वनस्पती. मरवा.
**पर्णासभेदः** (चक्र. ) **कुष्ठादिहरप्रदेहोपयोगी**
( चसू. ३.४ ) **शिरोविरेचनोपयोगी** ( चसू. २.४ )
**कुकूणके आश्चोतनोपयोगी** ( काखिल. १३.१७ )
मरवा. कुष्ठ इत्यादी नाशक म्हणून लेपोपयोगी, डोक्याचे रेचक म्हणून उपयुक्त. कुकूणकात डोळ्यावर शिंपडण्यास, घालण्यास उपयोगी.

**फणिन्**-पु., वनस्पति० फणिज्जक ( ध. ४.५२ ) मरवा.
**सर्प० दर्वीकरः अयं सर्वेषामनिलकोपनः**
( सुक. ४.२९ )
सर्प, नाग. सापाच्या सर्व जातींमध्ये हा विशेष वातकारक आहे.

**( फणि )–केसर**-न., वनस्पति०नागकेसरम्
( रा. ६.७४ ) नागकेशर.
**–चम्पक**-पु., वनस्पति० नागचम्पकः
( रा. १०.२४० ) नागचाफा.
**–जिह्वा**-स्त्री., वनस्पति० शतावरीभेदः, सहस्रवीर्या
( रा. ४.४४२ ) द्र० ' शतावरी ' महाशतावरी.
**–नेत्रा**-स्त्री., वनस्पति० सर्पाक्षी, गन्धनाकुली
( र. ११.४८ ) मुंगुसवेल प्रकार,
**–लता**-स्त्री., वनस्पति० ताम्बूली धपरि. ११.६ )
पानवेल. नागवेल.
**–वल्ली**-स्त्री., वनस्पति० ताम्बूली ( धपरि. ११.६;
र. १२.६४-७३) नागवेल, पानवेल.
**–हन्त्री**-स्त्री., वनस्पति० नाकुलीभेदः, महासुगन्धा
( रा. ७.१५३ ) द्र० ' नाकुली '
मुंगुसवेल प्रकार.
**–हृत्**-पु., वनस्पति० धन्वयासभेदः, क्षुद्रदुरालम्भा
( रा. ३.२३ ) द्र० ' धन्वयास '
लहान धमासा, धमासा.

**फणिर्जक**-पु., मरुबकः ( इन्दु. असंउ. ४३ ) मरवा.

**फम्फणा**-स्त्री., वनस्पति० इयं गर्भिणीस्नानजले निक्षेपार्थमुपयुक्ता ( असंशा. ३.१४ )
शेवाळाऐवजी गर्भिणीच्या स्नानाच्या पाण्यात घालण्यास उपयुक्त.

**फल**-पु., वनस्पति० मदनः ( ध. १.१६८ ) गेळफळ.
**( फला )**-स्त्री., वनस्पति० वार्ताकी ( रा. ७.१२८ )
वांगी.
न., **यत् साध्यते तत्, परिणामः** (चसू. २६.१३)
परिणाम. जे साध्य केले जाते ते. फल.
**उद्भिज्जस्यैकमङ्गम्, यथा पुष्पकाण्डादि**
( चसू. १.७३ )
उद्भिज्जाचे एक अंग. वनस्पतीचे एक अंग जसे फूल कांड फळ इ०.
**त्रिफला** ( ड. सुचि. ३८.२४; र. २०.२४५ )
त्रिफला.
**वनस्पति० मदनफलम्** ( चवि. ८.१३५ )
असंसू. १६.११; अहृसू. ८.१५ ) गेळफळ.
**जातीफलम्** ( ध. ३.३५ ) **कङ्कोलकम्** ( ध. ३.३७ )
जायफळ. कंकोळ.
**शारीर० मुष्कम्** ( सुनि. १२.४ ) अंड, वृषण.
**गर्भाशयः** ( ड. सुशा. ५.४१; र. २०.२४५ )
गर्भाशय.
**–कल्प**-पु., मदनफलस्य कषायादिकल्पना
( चक.१.३० ) गेळफळाचे काढा वगैरे कल्प.
**–कोश**-पु., शारीर० वृषणः ( असंउ. २९ )
अंडकोश, वृषण.
**–कोशवाहिधमनी**-स्त्री., धमनी० यामाश्रित्य दोषः फलकोषं गच्छति ( सुनि. १२.४ ) अण्डकोषानुसारिणी धमनीति, हाराणचन्द्रः
फलकोशवाहिनी धमनी.

अंडात वहन करणारी धमनी. जिच्या आश्रयाने व प्रेरणेने दोष अंडात जातात. अंडकोशात जाणारी धमनी.

**–कोष**–पु., **शारीर० अण्डकोषः** ( सुसू. २३.५ ) अंडकोष.

**–चोरक**–पु., **वनस्पति० चोरकः** ( ध. ३.७१ ) चोरओवा.

**–तैल**–न., **तैल० बस्तिव्यापच्चिकित्सायामुपयुक्तम्** ( काखिल. ८.९६ ) **अनुवासनोपयोगि** ( काखिल. १८.६६ ) **फलबिल्वादिसिद्धं तैलम्, कफाधिकपुरुषानुवासनोपयोगि** ( सुचि. ३७.४६ ) फलतैल. बस्तीच्या अनिष्ट परिणामात उपयुक्त. स्नेहाच्या बस्तीत उपयोगी. गेळफळ बेल इत्यादी सिद्ध तेल. कफाधिक पुरुषाला स्नेहबस्ति देण्यास उपयुक्त.

**–त्रय**–न., **त्रिफला** ( रा. २२.१; र. १५.५८ ) त्रिफळा.

**–त्रिक**–न., **त्रिफला** ( रा. २२.१ ) त्रिफळा.

**–दर्शन**–न., **आरोग्यलाभः** ( सुचि. १.७५ ) आरोग्याचा लाभ.

**–पाक**–पु., **वृक्षस्य फले जाते पाकत्वम्, पूर्णवीर्यवत्त्वम्** ( र. २९.४१ ) वृक्षाची फळे आल्यानंतर ती परिपक्व होणे. पूर्णवीर्यत्व.

**–पाकान्त**–वि., **फलपाकपर्यवसितं औद्भिदं द्रव्यम्, 'ओषधिःफलपाकान्ता'** ( असंसू. १२.३ ) फळ पिकले की जी वनस्पति नष्ट होते ती ( भात, गहू वगैरे ).

**–पिप्पली**–स्त्री., **मदनफलमध्यगतं पिप्पलीसदृशं बीजम्** ( चक्र. चक. १.१३; ड. सुसू. ४३.३ ) गेळफळातील पिंपळ्या. गेळफळातील पिंपळीसारखे बीज.

**–पिप्पलीक्षीर**–न., **फलपिप्पल्याः क्षीरपाकविधिना साधितं क्षीरम्, अधोगरक्तपित्ते हृद्दाहे चोपयुक्तम्** (चक. १.१७) फलपिंपळ्यानी सिद्ध केलेले दूध. खालच्या मार्गाने जाणाऱ्या रक्तपित्तात व हृदयातल्या दाहावर उपयुक्त.

**–पुष्पा**–स्त्री., **वनस्पति० खर्जूरभेदः, पिण्डखर्जूरिका** ( ध. ५.५५ ) **द्र० 'खर्जूर'** पेंडखजूर.

**–पूरक**–पु., **वनस्पति० बीजपूरकः, मातुलुङ्गम्** ( चचि. २०.२६; ध. ५.२२ ) महाळुंग.

**–पूरमूल**–न., **बीजपूरकमूलम्, वातजहृद्रोगे उपयुज्यते** ( चचि. २६.८४ ) **किंचेदं मूलं रक्तपित्तशमनार्थं शतावर्यादिघृते समुपयुज्यते** (चचि.४.९५) महाळुंगाचे मूळ. वातज हृद्रोगात उपयुक्त. रक्तपित्तशामक. शतावरीघृतात हे घालतात.

**–प्राशन**–न., **फलभक्षणम्** ( काखिल. १२.१५ ) फळ खाणे.

**–प्रिया**–स्त्री., **वनस्पति० प्रियङ्गुः** ( रा. १२.२८ ) गव्हला.

**–मात्रासिद्धि**–पु., **अध्यायसंज्ञा०** ( चसि. ११.१ ) अध्यायाचे नाव. बस्तीसाठी अत्यंत उपयुक्त फळांची माहिती यात आहे.

**–मुख्या**–स्त्री., **वनस्पति० अजमोदा** ( रा. ६.१५२ ) ओवा. अजमोदा.

**–यूष**–पु.. **योग० कपित्थबिल्वादिफलैः साधितः अयं जीर्णातिसारनाशनः** ( काखिल. ४.४७ ) कवठ, बेल इ० फळांनी तयार केलेले कढण. जुना अतीसार नाशक.

**–योनि**–स्त्री., **शारीर० गर्भाशयः** ( हे. अहसू. ३०.६ ) गर्भाशय.

**–रोचक**–पु., **वनस्पति० चोरकः** ( रा. १२.१२८ ) चोरओवा.

**–लुम्बि**–पु., **फलस्तबकः** ( हे. अहसू. ३.३५ ) फळांचे घोस.

**–वर्ग**–पु., **फलसंग्रहः, मधुरफलानि तालनारिकेलपनसादीनि, द्राक्षाकाश्मर्यखर्जूरादीनि तथा वातामाक्षोडाभिषुकप्रभृतीनि, क्षीरवृक्षफलजाम्बवराजादनफल्गुबिल्वप्रभृतीनि** ( चसू. २७.१२६-१२४; सुसू. ४६.१६३-१८८; असंसू. ७.२१० ) **तत्र दाडिमामलकद्राक्षाखर्जूरपरूषकराजादनमातुलुङ्गानि फलोत्तमानि** ( सुसू. ४६.३३४ ) गोड फलवर्ग. फलसंग्रह. ताड, नारळ, फणस, इ०, द्राक्षे, शिवण, खजूर इ०, बदाम, आक्रोड, पिस्ता इ०, उंबर इत्यादी दुधाळ झाडांची फळे, जांभूळ, खिरणी, अंजीर, बेल इत्यादी. त्यात डाळिंब, आवळा, द्राक्ष, खजूर, फाळसा, खिरणी, महाळुंग ही उत्तम फळे होत.

**–वर्ति**–स्त्री., **कल्प० घृताभ्यक्ते गुदे क्षिप्ता श्लक्ष्णा स्वाङ्गुष्ठसन्निभा। मलप्रवर्तिनी च या सा फलवर्तिः** (भा. प्र.) **इयं मलवायुनिःसारणेन शूलनाशनी श्यामामदनजीमूतफलादिभिः कृता वर्तिः**

( सुचि. ५.२६ ) वर्तिक्रियया विण्मूत्राधोवातानां प्रवर्तनं भवति ( अहृसू. ८.१६; सुउ. ४२.१४५ ) फलवर्ति. तूप लावून गुदामध्ये स्वतःच्या अंगठ्याच्या आकाराची गुळगुळीत सोंगटी करून वायु-मल-मूत्र यांचा अवरोध व शूल नाहीसा करण्यासाठी देतात. काळे निशोत्तर, गेळफळ देवडांगरी इ० फळांची ही करितात.

**–विष**–न., स्थावरविष० **कुमुद्वतीवेणुकाकरम्भमहाकरम्भकर्कोटकरेणुकखद्योतकचर्मरीभगन्धासर्पघातिनन्दनसारपाकानीति द्वादश फलविषाणि, तैर्मुष्कशोफदाहान्नद्वेषाश्च भवन्ति** ( सुक. २.५-८; असंउ. ४० )
वरील फलविषे १२ प्रकारची आहेत. यामुळे अंडशोफ, दाह अन्नद्वेष उत्पन्न होतात. फळांची नावे वर आहेत.

**–वृक्षक**–पु., वनस्पति० **पनसः** ( रापरि. ११.९ ) फणस.

**–शाडव**–पु., वनस्पति० **दाडिमः** ( ध. २.६१ ) डाळिंब.

**–शैशिर**–पु., वनस्पति० **बदरम्** ( ध. ५.९६ ) बोर.

**–संभारी**–स्त्री., वनस्पति० **काकोदुम्बरिका** ( ध. ५.८८ ) काळा उंबर, खर्वती.

**–सर्पिस्**–न., घृत० **स्त्रीभिः पुष्पे सेवितं सत् फलाय प्रजोत्पादस्वरूपाय भवतीति फलसर्पिः, इदं योनिशुक्रप्रदोषादिहरं म्रियमाणप्रजानां गर्भिणीनां च प्रशस्तम्** ( असंउ. ३९ )
फलघृत. जिची मुले वाचत नाहीत अशा स्त्रीला व गर्भिणीला उपयुक्त. हे योनि व शुक्रदोषहर.

**–साधिततैल**–न., तैल० **मदनफलसिद्धं तैलम्, कफेऽनुवासनार्थमुपयुज्यते** ( चसि. ३.७० )
फलतेल. गेळफळाने सिद्ध केलेले. कफदोषात स्नेहबस्तीकरिता उपयुक्त.

**–सार**–पु., वनस्पति० **कपित्थः** ( असंउ. ४९ ) कवठ.

**–सारासव**–पु., आसुत० **बिलेशयमांसभक्षणोत्तरमयमनुपानविशेषत्वेन कीर्तितः** ( सुसू. ४६.४३३ ) फलसारासव. फळातील मगजांचे आसव. बिळात रहाणाऱ्या प्राण्यांचे मांस खाल्ल्यावर अनुपान चांगले.

**–स्नेह**–पु., **फलोद्भवत्वात् स्नेहः फलयोजनया साधितः स्नेहः, यथा भल्लातकस्नेहः** ( सुचि. १.९४ ) फळांचा स्नेह. जसे बिब्ब्याचे तेल.
वनस्पति० **अक्षोटः** ( ध. ५.६० ) आक्रोड.

**–स्वादु**–पु., वनस्पति० **जलमधूकः** ( ध. ५.४८ ) ज्येष्ठमध.

**फलक**–पु., न., **काष्ठपट्टिका** ( सुचि. ६.४; अहृसू. २९.५९ ) लाकडी फळी. फळा.
**पार्श्वम्, पट्टः** ( र. २.५७ ) पट्टा.
**काष्ठपेटिका** ( असंसू. ८.५९ ) लाकडाची पेटी.
**शाल्मलीकाष्ठादिविरचितं पञ्चनिक्षेपणानामेकतमम्** ( सुसू. ४५.१८ )
सावरी इत्यादिकांच्या लाकडाची केलेली फळी, पेटी. पाणी ठेवण्याकरता करावयाच्या तिवई फळी इत्यादींपैकी एक.

**( फलिका )**–स्त्री., वनस्पति० **निष्पावी** ( रापरि. ७.९९ ) पावटे.

**फलत्**–वि., **स्फुटत्** ( ड. सुउ. ५९.४ ) सिद्धीस गेलेला.

**( फलिनी )**–स्त्री., **प्रशस्तफलवती ( ओषधिः ) सङ्ख्ययैकोनविंशतिः फलिन्यः** ( चसू. १.७४ )
चांगली फळे येणारे वृक्ष, एकोणीस फलिनी वृक्ष आहेत.
वनस्पति० **इक्ष्वाकुः, कटुतुम्बी** ( चक. ३.३ ) कडूभोपळा.
**प्रियङ्गुः** ( सुचि. ३८.२७; ध. ३.१६; असंसू. १५. ४५; अहृसू. १५.१४ ) गव्हला.
**योनिरोग० त्रिदोषजोऽयम्, तल्लक्षणम्–अतिकायगृहीतायास्तरुण्या योनिः फलिनी कथ्यते** ( सुउ. ३८.१८ )
योनिरोग. हा त्रिदोषज होय. दीर्घ व जाड लिंगाने मैथुन झालेल्या तरुणीची योनी.

**फलाम्बु**–न., **फलोदकम्, फलसिद्धमुदकम्** ( असंचि. ३ ) फळाचे पाणी. नारळपाणी.

**फलाढ्या**–स्त्री., वनस्पति० **काष्ठकदली** ( रा. ११.११० ) दगडी केळ, लाकडी केळ.

**फलादि**–वि., **फलं मदनफलमादिर्यस्य तथाविधः, गणोऽयं कफजहृद्रोगे उपयुज्यते** ( सुउ. ४३.१८ )
गेळफळादिवर्ग. कफज हृद्रोगात उपयुक्त.

**फलाम्ल**–पु., **बीजपूररसः अयं क्षारप्रक्षालनोपयुक्तः** ( सुचि. ६.४ ) महाळुंगरस.
वनस्पति० **अम्लवेतसः** ( रा. ६.१४७ ) अम्लवेतस

न., बीजपूरादि ( ड. सुचि. ३३.२० ) महाळुंगरस. तिन्तिडिका, अम्लवेतसः ( चचि. १४.९८ ) दाडिमबीजपूरकादिभिरम्लीकृतं मद्यम्, इदं पानाजीर्णे प्रयुज्यते ( सुउ. ४७.३८ ) दाडिमादीनामम्लम्, वातविकारिणां हितम् (सुचि.४.१३-१४) अमद्यपानामनुपानम् इदं सर्वविधमांसभक्षणे (सुसू. ४६.४२८)मांसेष्वनुपानम् (असंसू.१०.४७)
चिंच. अम्लवेतस. डाळींब महाळुंग इत्यादींनी आंबट केलेले मद्य. हे मद्यपानाने झालेल्या अजीर्णात –पानाजीर्ण रोगात देतात.
डाळींब इत्यादींचा आंबट रस, वातविकारात हितकर. मांसभक्षणानंतरचे अनुपान म्हणून पेय. मद्यपान न करणाऱ्यांना उपयुक्त.

**फलाम्लक**–न., वनस्पति॰ वृक्षाम्लम् ( रा. ६.१४४ )
अमसूल.

**फलारिष्ट**–पु., कल्प॰ कृष्णात्रेयप्रोक्तो हरीतक्यामलकविशालादिसिद्धः, अयं ग्रहण्यर्शोहृत्पाण्डुरोगप्लीहकामलाविषमज्वरवर्चोमूत्रानिलविबन्धाग्निमार्दवकासगुल्मोदावर्तनाशनोऽग्निसन्दीपनश्च
( चचि. १४.१४८-१५२ )
फलारिष्ट. हिरडा, आवळा, थोर इंद्रावण, सिद्ध अरिष्ट. ग्रहणी, मूळव्याध, हृदयरोग, पांडु, प्लीहा, कावीळ, विषमज्वर, मळमूत्रवात रुद्ध होणे, अग्निमांद्य, खोकला, गुल्म, वायूच्या उलट गतीमुळे पोट फुगणे, ही विकृति नाशक व अग्निदीपक.

**फलाशिन्**–वि., फलभक्षकः ( सुसू. ४६.१३४ )
फळे खाणारे ( पोपट वगैरे ).

**फलिन**–पु., वनस्पति॰ पनसः ( रापरि. ११.९ ) फणस.

**फलेरुहा**–स्त्री., वनस्पति॰ पाटलाभेदः, काष्ठपाटला ( ध. १.१२२ ) द्र॰ 'पाटला' पाठा; पाटला.
सितपाटलिः ( रापरि. १०.१६ )
सितपाटली. पांढरी पाडळ.

**फलोत्तमा**–स्त्री., द्राक्षाभेदः, काकलीद्राक्षा ( रा. ११.७९; ध. ५.५८ ) द्र॰ 'द्राक्षा' द्राक्ष.

**फलोदक**–न., फलरसः, फलसिद्धमुदकम्, रक्तपित्ते तृष्णाहरमेतत् ( चचि. ४.५१ )
फळांचे रस; फळांनी सिद्ध पाणी, रक्तपित्तात तहान हारक.

**फल्गु**–पु., ज्वर॰ लक्षणानि–"अन्तर्दाहो बहिः शीतं तस्य तन्द्रा च बाधते। तुद्यते दक्षिणं पार्श्वमुरःशीर्षगलग्रहाः। निष्ठीवेत् कफपित्तं च तृष्णा कण्डूश्च जायते। विड्भेद-श्वास-हिक्काश्च बाधन्ते सप्रमीलकाः॥ विधु-फल्गू च तौ नाम्ना सन्निपातावुदाहृतौ।" ( मानि. ) पित्तश्लेष्माधिक-सन्निपात-ज्वरः, ( काविशेषक. )
ज्वर प्रकार. लक्षणे– आत दाह, बाहेर थंड, तंद्रा, उजव्या फासळीत टोचणी, छाती, डोके, गळा जखडणे. कफपित्त, खाकरा, तहान, खाज, फुटलेला मळ, श्वास, उचकी, झापड.
स्त्री., वनस्पति॰ मलयुः ( इन्दु. असंउ. १० )
काळा उंबर.
काकोदुम्बरिका काष्ठोदुम्बरिका (चक्र.चचि.१०.१९; असंसू. १५.३९; अहसू. ६.१२०)
तद्गुणाः–मधुरा गुरुः स्निग्धा विष्टम्भिनी तर्पणी च ( सुसू. ४६.१७१ ) काळा उंबर.
**गुण**–गोड, जड, स्निग्ध, मलावष्टंक, पोषक.
काष्ठोदुम्बरिका ( चचि. २(१).२७; सुउ. ६१.३४ )
श्रमहरगणोक्तमेकं द्रव्यम् ( चसू. ४.१६ )
काळा उंबर, श्रमहरगणातील एक द्रव्य.
न., फल॰ औदुम्बरम्, तद्गुणाः–गुरु शीतलं विष्टम्भि बृंहणं तर्पणं च ( चसू. २७.१२८ )
उंबराचे फळ–जड थंड मलावष्टंभक पौष्टिक व पोषक.

**–वाटिका**–स्त्री., वनस्पति॰ काकोदुम्बरिका ( रा. ११.१४२ ) काळा उंबर, बोखाडा.

**–वृन्ताक**–पु., वनस्पति॰ टिण्टुकभेदः, पृथुशिम्बः ( रा. ९.१४२; ध. १.११५ ) द्र॰ 'टिण्टुक'
मोठी शेंग असलेला टेंटूचा प्रकार.

**फल्गुनी**–स्त्री., वनस्पति॰ काकोदुम्बरिका ( ध. ५.८८ )
काळा उंबर, बोखाडा.

**फल्गू**–स्त्री., वनस्पति॰ काकोदुम्बरिका ( ध. ५.८८ )
काळा उंबर. बोखाडा.

**फाणित**–पु., क्षौद्रगुडकृतः, मृदुस्नेहनः, बालवृद्धादीनां सद्यःस्नेहनकृत् ( अहसू. १६.४१ )
मध व गूळ यांचे केलेले मिश्रण. मृदु स्नेहन करणारे. बालक व वृद्ध इत्यादींना तावडतोब स्नेहन करणारे.
न., इक्षुविकारः अर्धशृत इक्षुरसः(चक्र. चसू.३.१६)
स्त्यानमध्वाकृति ( सुउ. ४०.९० ) तत्स्वरूपम्–किञ्चिद्गाढो बहुद्रवो यः पक्व इक्षुरसः, स

फाणितमित्युच्यते (भा. प्र.) तद्गुणाः- गुरु मधुरमभिष्यन्दि बृंहणमवृष्यं त्रिदोषकृत् (सुसू. ४५.१९५)
स्निग्धोष्णं चलकृच्च ( असंसू. १७.४१ )
इक्षुविकाराणामहिततममेतत्
( चसू. २७.३९; अहृसू. ५.५१ )
काकवी, अर्धा कच्चा गूळ, मधासारखा घट्ट व थोडा दाट पण पुष्कळ पातळ असा शिजवलेला उसाचा रस. **गुण**— पचावयास जड, गोड, कफकर, पौष्टिक, शुक्रनाशक, त्रिदोष उत्पन्न करणारी आहे. उसाच्या रसाच्या केलेल्या पदार्थांपैकी अतिशय अहितकर.

**फाणितीभूत**–वि., **फाणितीकृतम्, फेनिलम्**
( चक. १.२० )
काकवीसारखे दाटसर द्रव्य, फेसाळ.

**फाण्ट**–पु., न., **कल्प० कषायभेदः, भेषजमुष्णतोये क्षिप्त्वा मृदितं तत्** ( चसू. ४.७; असंक. ८ )
**आन्तरिक्षेण वारिणा क्वथितोऽर्धावशेषितः सकृद्वा फाणितः कषायः अल्पदोषबले बाले लघुव्याधौ च प्रशस्तोऽयम्** ( काखिल. ३.४० )
फांट. पावसाच्या पाण्यात कढवून अर्धा ठेवलेला काढा. अथवा एक उकळी आलेला काढा दोष अल्प असता, बालकांना, व लहानशा रोगासाठी चांगला.

**फाल**–पु., **लोहफलकः, तापस्वेदे उपकरणेऽवेकम्**
( अहृसू. १७.१ )
लोखंडी रुंद पट्टी, ताप नावाचा शेक देण्याचे उपकरण.

**–कृष्ट**–वि., **फालेन कृष्टः** ( चक. १.९ )
फाळाने नांगरलेला.

**फाल्गुन**–पु., **वनस्पति० अर्जुनः** ( रा. ९.१९३ )
अर्जुनसादडा.
**मास० "फाल्गुनचैत्रौ वसन्तः"** ( सुसू. ६.१० )
फाल्गुन महिना. फाल्गुन-चैत्र वसंतऋतु.

**फिरङ्ग**–पु., **रोग० अयमागन्तुजः, अस्मिन् दोषसङ्क्रमोऽनन्तरं भवति। स त्रिविधः- बाह्य आभ्यन्तरो बहिरन्तर्भवश्च, बाह्यलक्षणम्–विस्फोटसदृशोऽल्परुक् स्फुटितो व्रणवद् भवति। आभ्यन्तरलक्षणम्–असौ सन्धिषु भवति, आमवात इव व्यथां शोफं च जनयति। बहिरन्तर्भवलक्षणम्–क्षीणोपद्रवैर्युतः कार्श्यबलक्षयनासाभङ्गादियुतो बहिरन्तश्च व्याप्तः तत्र बाह्यो नवीनो निरुपद्रवश्च साध्यः, आभ्यन्तरः कष्टसाध्यः, बहिरन्तर्भवश्च क्षीणोपद्रवयुक्तोऽसाध्यः, तदुपद्रवाः–कार्श्यंबलक्षयो नासाभङ्गो वह्निमन्दताऽस्थिशोषोऽस्थिवक्रता च** ( माफिरङ्गनि. )
फिरंग–फिरंग्यापासून आलेला तो फिरंग–गरमीरोग, हा आगंतुरोग आहे. यात दोषांची दुष्टी मागाहून होते. रोगपरिणाम प्रथम दिसतो. त्याचे प्रकार तीन. (१) बाह्य (२) आभ्यन्तर (३) दोन्ही ठिकाणी होणारा. (१) **बाह्य-लक्षणे** शिश्नाच्या मण्यावर फोड (जळाल्यासारखा) थोडी वेदना, फुटल्यावर व्रण. (२) **आतला**–सांधे व इतर शरीर घटकांवर होतो. आमवातासारखी सूज वेदना.
(३) **अंतर्बाह्य**–कृशता बलनाश, नाक तुटणे.
बाहेरचा–नवीन व निरुपद्रवी साध्य, आंतला कष्टसाध्य व दोन्हीतला असाध्य. उपद्रव–कार्श्य, बलक्षय, नाक झडणे अग्निमांद्य, अस्थिक्षय, अस्थि वाकडे होणे.

**फुप्फुस**–पु., न., **शारीर० हृदयनाडिकालग्न उरःस्थोऽवयवः, असौ शोणितफेनप्रभवः** ( सुशा. ४.२५; असंशा. ५.४८ ) **"उदानवायोराधारः फुप्फुसः प्रोच्यते बुधैः"** ( शार्ङ्गधर. पूर्वखंडे ५.४५ )
फुप्फुस, शरिराचा एक भाग. हृदयाच्या नाडींना संलग्न उरातील अवयव. हा रक्ताच्या फेसापासून झालेला अवयव आहे. रक्त व वात या दोहोपासून झालेला. उदान वायूचा आधार फुफ्फुस हे तज्ञांनी सांगितले आहे.

**फुल्लकी**–स्त्री., **सौराष्ट्री-भेदः** ( र. ३.६६ )
तुरटीचा प्रकार.

**फुल्लतुवरी**–स्त्री., **खनिज० सौराष्ट्री-भेदः** ( र. ३.६९ )
तुरटीचा प्रकार.

**फेन**–पु., **समुद्रफेनः, अञ्जनोपयोगी** ( सुउ. १०.८ )
**लेखनद्रव्यम्** ( सुचि. १.४०; र. १९.३९ )
समुद्रफेस, अंजनाकरिता, लेखनाकरिता दोष खरडून काढण्यास उपयुक्त.
**मुखस्रावः** ( र. २३.७ ) तोंडातून येणारा फेस.

**(फेना)**–स्त्री., **वनस्पति० सातला** (ध. १.२३८) शिकेकाई,
न., **समुद्रफेनः** ( ध. ३.१५४ ) समुद्रफेस.
**जलहासः** ( सुक. १.४४ )
फेस. लहान लहान अनेक बुडबुड्यांचा समूह.

**–जन्मन्**–न., **फेनोत्पत्तिः** ( सुक. १.४४ )
फेसाची उत्पत्ती.

**–दुग्धा**–स्त्री., **वनस्पति० दुग्धफेनी**
( रापरि. ५.३४ ) एक दुधाळ वनस्पती.

**–पटल**–न., **फेनसमूहः** ( असंसू. ८.११ )
बराचसा फेस. फेसाचा थर.

**–भूत**–वि., **फेनसदृशम्** (चचि. १५.९) फेसासारखे.

**–माला**-स्त्री., **फेनसंहतिः** ( चचि. २३.१११; असंसू. ८.११ ) फेसाच्या बुडबुड्यांची रांग.

**–मेह**–पु., कफजमेहः **तल्लक्षणम्–फेनमेही स्तोकं स्तोकं सफेनमच्छं मेहति** ( सुनि. ६.१० ) **फेनमेहिने त्रिफलारग्वधमृद्विकाकषायो मधुमधुरो देयः** ( सुचि. ११.९ )
एक कफमेह **लक्षण**– थोडे थोडे फेसयुक्त व स्वच्छ लघ्वी करतो. **उपचार**—त्रिफळा, बहावा, मनुका यांचा काढा मध घालून गोड करून द्यावा.

**–संघात**-पु. **अष्टौ क्षीरदोषेष्वेकः फेनसमूहः** ( चसू. १९.४(१); चचि. ३०.२४० )
बराच फेस, दूषित दुधाचा एक दोष.

**फेनक**-पु., जलविकारः **समुद्रफेनः** ( सुचि. २४.५५ )
समुद्रफेस.
भक्ष्य० गोधूमचूर्णकृतः, तरकृतिः– "**विमर्द्य विमलां शुक्लां समितां नातिशर्करां संवेष्टनाय गर्भार्थे खरपाकं घृते पचेत्** " (ड) **तद्गुणाः–बृंहणो वातपित्तघ्नो हृद्यो बल्यः पथ्यतमो लघुश्च** ( सुसू. ४६.३९९ )
करंजी अथवा कडबूसारखे पक्वान्न स्वच्छ पांढरा मैदा किंवा सपीठ घेऊन थोडी साखर घालून चांगले मळावे व त्यात हवे असेल ते गोड अथवा तिखट–मिठाचे पूरण भरून लाल होईपर्यंत तुपात तळावे. **गुण**— पौष्टिक वातपित्त नाशक हृदयाला हितकर बलवर्धक हलके अतीशय पथ्यकर.

**फेनागमन**–न., **लक्षण० फेनस्रावः** (चनि. ७.७ (१))
रोग लक्षण– तोंढातून फेस येणे.

**फेनानुविद्ध**–वि., **फेनमिश्रम्** (सुनि. १०.११) फेसयुक्त.

**फेनाश्मन्**–न., धातुविष० **मल्लः** (सुक. २.५;असंसू.४०) **अनेन हृत्पीडनमूर्च्छातालुदाहा भवन्ति** (सुक.२.१०) सोमल. याने हृदयात पीडा, मूर्च्छा, टाळूचा दाह होतो.

**फेनिल**–वि., **फेनसहितम्** ( सुसू. १४.२१ )
फेसासह, फेसाळलेला.
पु., **वनस्पति० रीठाकरञ्जः** ( रा. ९.१८७; र. ३०.६९) रीठा, रिंग्ये.
न., **वनस्पति० बदरम्** ( ध. ५.९६ ) बोर.

**(फेनिला)**–स्त्री., **वनस्पति० उपोदिका** ( चक्र. चचि. २९.११०; ड. सुउ. ३९.२८४ )
राजगिरा.

**–फल**–न., **अरिष्टकफलम्, रीठाकरञ्जः** (र. ३०.४६)
रीठा फळ, रिंग्येफळ.

**फेनोद्गमन**–न., लक्षण० **कुमारस्य ग्रहोपसृष्टस्य मुखात् फेनस्य प्रवृत्तिः** ( सुशा. १०.५१ )
फेसाची ओकारी होणे, ग्रहबाधा झालेल्या बालकाच्या तोंडातून फेस येणे.

**फोण्डालु**–पु., वनस्पति० **तद्गुणाः– कटुरुष्णो दीपनः श्लेष्मवातघ्नश्च** ( रापरि. ७.३० )
फोण्डालु. **गुण**— तिखट, उष्ण, दीपक, वातकफघ्न.

## ब

**बक**–पु., पक्षि० **प्लवजातीयः अयं संघातचारी पाण्डुरपक्षो जलचरश्च** ( चसू. २७.४१; सुसू. ४६.१०५ )
हिं.—बगुला.
बं.—बकोट.
**म.—बगळा.**
कळपाने फिरणाऱ्या पांढरा रंगाचा जलचर पक्षी.
**वनस्पति० वसुकः** ( रा. १०.३३ ) मंदार रुई.

**बकर**–पु., **पक्षि० प्लवजातीयः, अयं बकसदृशः** ( अहसू. ६.४५ )
बगळ्यासारखा पाण्यांत तरंगणारा पक्षी.

**बकुल**–पु., **वनस्पति० अयं वसन्ते पुष्पितो भवति** ( सुसू. ६.२७ ) **तद्गुणाः– मधुरः कषायः शीतो हृद्यो हर्षकरो विषघ्नश्च** ( ध. ५.१५४ )
बकुळ. वसंत ऋतूत याला फुले येतात. **गुण**–गोड, तुरट, थंड, हृदयास हितकर, विषनाशक, आनंदवर्धक.
न., **बकुलपुष्पम्, तद्गुणाः– मधुरं कषायं शीतलं स्निग्धं संग्राहि** ( ध. ५.१५४ ) **पित्तकफास्रजित्** ( असंसू. १२.८६ ) **रूक्षं गुरु विबन्धाध्मानजननं स्तम्भनं वातकोपनं च** ( असंसू. ७.१८२ )
हिं.—बकुल.
**म.—बकुळ.**
बं.—बकुलगाछ.
ता.—मोगदम्.
गुण–गोड, तुरट, थंड, स्निग्ध, मळ घट्ट करणारे, पित्तकफ रक्त दोष नाशक. रुक्ष, जड, मलावष्टंभ, पोटफुगी करणारे व वातप्रकोपक.

**बकुलफलम्**, तद्गुणाः—कषायं मधुरं गुरु दन्त्यं च ( ध. ५.१५४ )
बकुळफळे. तुरट, गोड, पचनाला जड, दाताला हितकारक.

**( बकुला )**–स्त्री., वनस्पति० **कटुका** ( रा. ६.५४ )
कुटकी.

**बक्कस**–पु., आसुत० जगलोऽद्रवः, **किण्वौषधमात्रम्**, तद्गुणाः—गुरुर्दीपनो विशदः सृष्टविण्मूत्रोऽल्पमदो विष्टम्भी वातकोपनश्च ( सुसू. ४५.१८११-८२; असंसू. ६.१२२ )
आसवांचा तळातील औषधी गाळ सुकवून झालेले चूर्ण. **गुण**–जड दीपक स्वच्छ मळमूत्रांची प्रवृत्ती करणारा, थोडा माज निर्माण करणारा, अवष्टंभक व वातप्रकोपक.

**बक्वस**–पु., आसुत० बक्कसः, अद्रवो जगलः ( सुसू. ४५.१८१ ) बक्कस. पहा 'बक्कस'.

**बडिश**–पु., ऋषि० रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः ( चसू. १.११ ) गर्भस्य हस्तपादौ पूर्वमभिनिर्वर्तेते इति मतविशेषमास्थितः ( चशा. ६.२१ )
रोगनाशनासंबंधी विचार करण्यासाठी हिमालयात जमलेल्या महर्षींपैकी एक ऋषि. गर्भाचे हात पाय प्रथम निर्माण होतात असे मत मांडणारा.
शस्त्र० **बडिशम्** ( असंसू. ३४.३१ )
बडिश नावाचे एक शस्त्र.
न., यन्त्र० **मत्स्यवेधनम्** ( हे. अहृसू. २५.३१ ) **मत्स्यबन्धनयन्त्रम्** ( ड. सुक. ३.२९ )
बडिशयंत्र, मासा धरण्याचा गळ.
शस्त्र० शल्याहरणोपयोगि, अङ्कुशवदानतं तीक्ष्णकण्टकमुखं मानतः षडङ्गुलम् ( सुसू. ८.३-११ ) गलशुण्डिकार्मादेर्ग्रहणे उपयुक्तम् ( असंसू. ३४.३१; अहृसू. २६.१६ )
बडिशशस्त्र. शल्य काढण्यास उपयुक्त. अंकुशासारखे वाकडे, तीक्ष्ण काट्याच्या आकाराचे तोंड असलेले सहा अंगुळे लांब शस्त्र, गलशुंडी पापणीचे रोगात उपयुक्त.

**–मुखा**–स्त्री., शलाका० बडिशाकृतिरेषा शल्याऽऽहरणार्था ( सुसू. ७.१४; असंसू. ३४.१५ )
शलाकाप्रकार. बडिशयंत्रासारखे तोंड असलेली सळई. ही शल्य काढण्यास उपयुक्त.

**बदर**–पु., वनस्पति० देवसर्षपकः ( रापरि. ९.४२ )
बोर, कापूस, देवसर्षपक.
न., मान० **शाणद्वयम्** ( चक. १२.८९ )
प्रमाणविशेष–एक तोळा.
वनस्पति० स्वेदोपगगणोक्तमेकं द्रव्यम् ( चसू. ४.१३; असंसू. १५.२७ ) उदर्दप्रशमनगणोक्तमेकं द्रव्यम् (चसू. ४.१७; असंसू. १५.४२) हृद्यगणोक्तमेकं द्रव्यम् ( चसू. ४.१०; असंसू. १५.१५ ) श्रमहरगणोक्तमेकं द्रव्यम् ( चसू. ४.१६; असंसू. १५.३९ ) विरेचनोपगगणोक्तमेकं द्रव्यम् (चसू. ४.१३; असंसू. १४.४) वातसंशमनवर्गोक्तमेकं द्रव्यम् ( सुसू. ३९.७ ) पित्तश्लेष्मप्रकोपि च ( चसू. २७.१३२ ) हिध्मानाशनम् ( असंसू. १५.३० ) वमिनिग्रहणगणोक्तमेकं द्रव्यम् ( असंसू. १५.२८ ) बदराणि श्वाविधवराहमांसानि चैकध्यं नाश्नीयात् ( असंसू. ९.९ ) कर्कन्धुकोलबदरसौवीरसिञ्चितिकेतिभेदेन पञ्चविधम् तत्सामान्यगुणाः— मधुरं स्निग्धं भेदनं वातपित्तजित् (चसू. २७.१४१) तत्र कर्कन्धुरल्पबदरम्, कोलं मध्यप्रमाणम्, बदरं महत्, सौवीरं महत्तमम्, सिञ्चितिकाफलं मुष्टिप्रमाणं च, आमं कर्कन्धु-कोल-बदरं पित्तकफावहम्, पक्वं समधुरं स्निग्धं सरं पित्तानिलहरं च, पक्वमामं च सौवीरं मधुरं स्निग्धं वातपित्तजिच्च, सिञ्चितिकाफलमतिमधुरम्, पुरातनं बदरं तृट्शमनं लघु दीपनं श्रमघ्नं च ( सुसू. ४६.१३९; ध. ५.९८ ) बृंहणं गुरु विष्टम्भि कफशुक्रकृच्च (अहृसू. ६.१२१) राजनिघण्टौ–बदरं राजबदर-भूबदरी-लघुबदरभेदेन त्रिविधम्, तत्सामान्यगुणाः—मधुरं कषायमम्लमुष्णं कफकृत् श्रमशोषातिसाररक्तदोषघ्नं रुच्यं च, तत्र राजबदरं सुमधुरं शिशिरं वृष्यं पित्तवातघ्नं दाहार्तिशोषश्रमघ्नं च, भूबदरी मधुराम्लारुच्या पथ्या दीपनपाचनी किञ्चित् पित्तास्रकारिणी कफवातघ्नी च, लघुबदरं मधुराम्लं, पक्वं कफवातनाशनं रुच्यं स्निग्धं तु जन्तुकृदीषत् पित्तार्तिदाहशोषघ्नं च ( रा. ११.१६०-६५ ) बदरबीजं हिक्कानिग्रहणम् ( चसू. ४.१४ ) बदरफलं नेत्ररोगघ्नं च ( रा. ११.१५९ ) नाडीव्रणेषु त्वग्, वर्तिद्वारा उपयुज्यते (सुचि. १७.३४) बदरमज्जा कषायमधुरः पित्तनाशनश्च ( सुसू. ४६.२०६ ) बदरपत्रं लेपेन ज्वरदाहघ्नम् ( रा. ११.१५९ ) बदरत्वच·

विस्फोटशमनी ( रा. ११.१५९ ) बदरकाष्ठाग्निर्मृदुः ( र. १७.६९ )

हिं.—बेर.
**म.—बोर.**
गु.—बोरडी.
बं.—कुल.
त.—इलन्तै.
फा.—कुनार.

बोर. स्वेद निर्माण करून रोगशमन करणाऱ्या गणातील एक द्रव्य, उदर्दनाशक गणांतील द्रव्य. उचकीनाशक, हृद्य, श्रमहर, विरेचन वांति थांबवणाऱ्या वातसंशमन-वर्गातील एक द्रव्य. पित्तकफप्रकोपी.

साळई पक्षाचे मांस, बोरे, आणि डुकराचे मांस एकत्र खाऊं नये.

कर्कंधु, कोल, बदर, सौवीर, सिंचितिका असे याचे पाच प्रकार आहेत.

सामान्य गुण–मधुर, स्निग्ध, भेदन, वातपित्तशामक. कर्कंधु ही अत्यंत बारीक असणारी बोरे.

कोल मध्यम प्रमाणात असणारी, बदर ही मोठी. सौवीर ही त्यापेक्षा मोठी, सिंचितिका ही सर्वांत मोठी मुठीएवढी असतात.

कर्कंधु–कोल–आणि बदर ही कच्ची वापरली तर पित्तकफकारक आहेत. पक्व खाल्ली तर मधुर, स्निग्ध, सारक, पित्तवातशामक आहेत. सौवीर ही पक्व आणि कच्ची, मधुर, स्निग्ध, वातपित्तशामक असतात. सिंचितिका हे फळ अतीशय गोड आहे. जुळी बोरे तहान शामक आहेत. पचावयास हलकी, दीपन आणि श्रमशामक आहेत, पौष्टिक, पचायला जड, अवष्टंभकारक, कफ आणि शुक्र वाढवणारी आहेत.

राजनिघंटुमध्ये राजबदर, भूबदर व लघुबदर असे बोरांचे तीन प्रकार आहेत. त्यांचे सामान्य **गुण**– गोड, तुरट, आंबट, उष्ण, कफकर, थकवा, शोष, अतिसार, रक्तदोष याचे नाशक व रुचकर.

**राजबदराचे गुण**–फार गोड, थंड, पौष्टिक, पित्त-वातनाशक, दाह, पीडा, कोरड व श्रमनाशक.

**भूबदराचे गुण**–गोड, आंबट, रुचकर दीपक, पाचक, किंचित पित्त व रक्त वाढवणारे, कफवात-नाशक.

**लघुबदराचे गुण**–गोड, आंबट, पिकले म्हणजे कफवातनाशक, रुचकर, स्निग्ध, कृमि उत्पन्न करणारे, किंचित पित्त, पीडा, दाह आणि कोरड-नाशक असते.

**बोराचे बी** उचकी नाहीसे करणारे व नेत्ररोगहर आहे. बोराची फळावरील साल नाडीव्रणामध्ये वर्ति म्हणून उपयोगी आहे.

**बोराचा गर**–तुरट, मधुर, पित्तशामक आहे.

**बोराची पाने**–ज्वरातील दाहनाशनाकरिता लेपा-साठी वापरतात. **बोरीची साल**–विस्फोटनाशक आहे. बोराच्या काष्ठांचा अग्नि सौम्य आहे.

**(बदरी)**–स्त्री., **वनस्पति० वृक्षः बदरवृक्षः** (चक. १.८; सुसू.३८.४८ ) बोरीचे झाड.
**वनस्पति० कार्पासी** ( रापरि. ४.४५ ) कपाशी.
**कपिकच्छूः** ( रापरि. ३.२०१ ) खाजकुहिली.

**–तर्पण**–न., **कल्प० बदरकृतस्तर्पणः, योगः वमनकृदसौ** ( चक. १.२६ )
बोरापासून केलेले औषध. गेळफळासारख्या वामक औषधावरोबर दिले तर वांती करते.

**–पानक**–न., **आहारद्रव्य० बदरसिद्धं पानकम्, वमनकरमिदम्** ( चक. १.२६ )
पन्हे ( बोरांचे ). वामक औषधयोगात वापरल्यास हे वांती करते.

**–फली**–स्त्री., **वनस्पति० बदरभेदः, भूबदरी** ( रा. ११.१६२ ) द्र० ' बदर ' लहान बोर.

**–मद्य**–न., **आसुत० बदरसिद्धं मद्यम्, वमनकृदिदम्** ( चक. १.२६ )
बोराचे मद्य. हे वामक औषधयुक्त असेल तर वांती करते.

**–मांसरस**–पु., **पेय० बदरयुक्तो मांसरसः वामकोऽसौ** ( चक. १.२६ )
बोरे मांसरसात घालून वामक औषधासह केलेला एक पदार्थ. हा वांती करतो.

**–मोदक**–पु., **आहारद्रव्य० बदरकृतो मोदकः** ( चक. १.२६ ) बोराचा लाडू.

**–यूष**–पु., **आहारद्रव्य० बदरकृतो यूषः, सम्यग्वामकः** ( चक. १.२६ ) **वातशूलघ्नः** ( सुउ. ४२.९८ )
बोराचे कढण. हा वांतीचे औषधयुक्त दिल्यास चांगला वांती करणारा असून वातशूलनाशक योग आहे.

**-राग**-पु., कल्प० बदरकृतो रागः, अरोचकघ्नः ।
बोराचे लोणचे.
**सम्यग्वामकश्च** ( चक. १.२६ )
अरुचिनाशक असून वांतीच्या औषधाबरोबर वापरल्यास वांती सुखाने होते.

**-लेह**-पु., कल्प० बदरनिर्मितो लेहः, सम्यग्वामकः ( चक. १.२६ )
बोरांचा केलेला लेह. चाटण वामक औषधयुक्त दिले तर ओकारी करण्यास चांगले.

**-षाडव**-पु., कल्प० बदरकृतः षाडवः, षाडवो मधुराम्लसंयोगविशेषरूपः ( चक. १.२६ )
बोरे घातलेले कढण किंवा पातळ भाजीचे पाणी.

**-संमित**-वि., अर्धकर्षप्रमाणम् ( ड. सुउ. ५८.३७ )
अर्धा तोळा प्रमाण.

**बदराम्ल**-न., शूकधान्यकुधान्यशमीप्रभृतिर्निर्दिष्टपूर्वान्नसमूहभक्षणोत्तरमिदमनुपानत्वेन प्रकीर्तितम् ( सुसू. ४६.४३३ ) बोराचे अम्ल. गहू इ० सावा इ० डाळी इत्यादी अन्न खाल्ल्यानंतर अनुपान म्हणून उपयुक्त.

**बदरिका**-स्त्री., वनस्पति० घोण्टा ( रापरि. ८.२२ )
घोंटा, बोराचा प्रकार.

**बदरिवल्ली**-स्त्री., वनस्पति० बदरभेदः, भूबदरी ( रा. ११.१६२ ) द्र० 'बदर' बोराचा प्रकार.

**बदरी**-स्त्री., वनस्पति० बदरवृक्षः ( चक. १.८ )
बोराचे झाड.

**-पत्र**-पु., भैषज्य० नखम् ( रा. १२.१०८ ) नखला.

**-पल्लवोत्थ**-वि., बदरीपत्राणां मथनाज्जातं फेनादि दाहे लेपनार्थं शस्तम् ( चचि. २४.१६० )
बोरीचे पानांचा फेस. दाह असताना लेपासाठी उपयुक्त.

**बदरोत्कारिका**-स्त्री., आहारद्रव्य० बदरनिर्मितोत्कारिका सम्यग्वामनीयम् ( चक. १.२६ )
बोराच्या पिठाची भाकरी. ही सुद्धा वांतीचे औषध घालून केली तर वांती करविण्यास उत्तम.

**बदुला**-स्त्री., वनस्पति० एलाभेदः, सूक्ष्मैला ( ध. २.४४ ) द्र० 'एला'
सूक्ष्म एला; लहान वेलची.

**बद्ध**-वि., ग्रथितम् ( सुचि. १४.१७ )
गाठाळलेले, अडलेले, साठलेले.

**-गुद**-न., उदररोगः, बद्धगुदोदरम् ( सुचि. १४.३ )
उदररोगाचा प्रकार.

**-गुदोदर**-न., उदररोगः, तत्सम्प्राप्तिः-सहान्नभुक्तैः पक्ष्मबालैरुदावर्तैश्च तथाऽर्शोभिरन्त्रसम्मूर्च्छनेन वा मार्गसंरोधात् कुपितोऽपानोऽनिलोऽग्निं हत्वा वर्चःपित्तकफान् रुध्वा बद्धगुदोदरं जनयति ( चचि. १३.४० ) तद्रूपाणि- तृष्णादाहज्वरमुखतालुशोषोरुसादकासश्वासदौर्बल्यारोचकाविपाकवर्चोमूत्रसङ्गाध्मानच्छर्दिक्षवथुशिरोहृन्नाभिगुदशूलान्यपि चोदरं मूढवातं स्थिरमरुणं नीलराजि सिरावनद्धराजिकं वा प्रायो नाभ्युपरि गोपुच्छवदभिनिर्वर्तते ( चचि. १३.४१; असंनि. १२.३१-३४ ) हृन्नाभिमध्ये वृद्धिमेत्युदरम्, अत्र विट्समगन्धिकं प्रच्छर्दनं भवति ( सुनि. ७.१८ ) शस्त्रचिकित्स्योऽयं व्याधिः ( सुचि. १४.१७ )
बद्धगुदोदर हा उदररोगाचा प्रकार आहे. ज्या वेळी अन्नाबरोबर बरेचसे केस पोटात जातात त्या वेळी तसेच उदावर्त विकाराने, मूळव्याधविकाराने, आतडे दुसऱ्या आतड्यात गुंतल्यामुळे किंवा मार्गाचाच अवरोध झाल्याने कुपित झालेला अपानवायु अग्निमांद्य निर्माण करून अग्नीचे कार्य बंद पाडून मळ, पित्त आणि कफ यांना अडवून बद्धगुदोदर निर्माण करतो.
त्याची **लक्षणे**—तहान लागणे, आग होणे, ज्वर, मुख, तालु यांचा शोष, मांड्या गळणे, खोकला, श्वास, अशक्तता, अरुचि, पचन न होणे, मलमूत्रांचा अवरोध होणे, पोट फुगणे, ओकारी, शिंका, डोके, हृदय आणि नाभि, गुद या ठिकाणी ठणका असणे. पोट वातावरोध होऊन ताठलेले तांबुस व निळ्या शिरांनी व्याप्त होऊन नाभीच्या वर बहुतेक गाईच्या शेपटीसारखे होते. हृदय व नाभीच्या मध्ये पोट वाढते, वांती झाली तर तिला मळासारखा दुर्गंध येतो. शस्त्रचिकित्सा करण्याची आवश्यकता असणारा हा विकार आहे.

**-निष्यन्द**-वि., लक्षण० बद्धमूत्रं रुद्धपूयगतिकं वा ( सुसू. ३३.२२ ) मूत्र अडणे, पूयस्राव थांबणे.

**-निस्यन्द**-वि., लक्षण० बद्धमूत्रम् ( सुसू. ४५.१८७ )
मूत्र अडणे.

**-प्रच्युतदोष**-वि., लक्षण० बद्धः प्रच्युतः वा पुरीषादिरूपो दोषो यस्मिन् सः ( ज्वरः ) ( चचि. ३.१६८ )
ज्या विकारात बद्ध किंवा सरणारा पुरीषदोष आहे असा विकार.

**-रसाल**-पु., ( परिव० ) **वनस्पति० आम्रभेदः, राजाम्रः** ( रा. ११.११ ) **द्र० 'आम्र'** आंबा.

**-वर्चस्**-वि., **ग्रथिताल्पपुरीषकृत्** ( अहृसू. ६.४ ) मळाच्या गाठी होऊन प्रमाणही अल्प करणारे औषध.

**-विट्क**-वि., **बद्धपुरीषम्, ग्रथितपुरीषम्** (अहृसू. ५.५६) मळाचा खडा होण्याची प्रवृत्ति.

**-विट्कता**-स्त्री., **लक्षण० शकृतः कृच्छ्रात्प्रवृत्तिः** ( सुउ. ३९.३० ) ( मळ कठीण गाठी सारखा झाल्याने ) कष्टाने मलप्रवृत्ती होणे.

**बद्धाक्ष**-वि., **वस्त्रादिभिर्बद्धनेत्रः** ( असंसू. ३३.९; अहृसू. २४.२१-२२ ) वस्त्र इ० नी डोळे बांधणे.

**बद्धाबद्धप्रलापिन्**-वि., **लक्षण० सम्बद्धाऽसम्बद्धजल्पकः** ( चचि. ९.२० ) सुसंगत किंवा विसंगत बडबड.

**बद्धायन**-वि., **बद्धमार्गम्** ( चचि. १३.३९ ) स्रोतसांचा मार्ग बंद पडलेला.

**बद्धास्य**-वि., **लक्षण० आस्ये स्थितिकरत्वेन चिरकालानुबद्धः** ( ड. सुउ. ५२.१४ ) तोंडाच्या ठिकाणी दीर्घकाल असलेला.

**बद्धोदर**-न., **उदरभेदः, बद्धगुदोदरम्** (चसू. १९.४ (१); अहृसू. १९.५) **द्र० 'उदर०'** उदरभेद. गुदद्वार संकुचित झाल्याने किंवा मळसंचयाने झालेला उदररोग.

**बद्धोदरिन्**-वि., **बद्धगुदोदरः** ( चचि. १३.१०५ ) बद्धगुदोदर झालेला.

**बधिर**-पु., **वनस्पति० भूतृणम्** ( रा. परि. ८.४२; रा. ८.७३ ) भूतृण, रोहिस गवत.

**कर्णरोग० जन्मबलप्रवृत्तो मातुरपचारजातो दौहृदापचारभवश्च** ( सुसू. २४.५ ) **बाधिर्यम्, तत्सम्प्राप्तिः—यदा कर्णस्रोतसि शुद्धो वायुः सकफो वा कर्णशष्कुलीपरिच्छिन्नमाकाशमाश्रित्य विविधमार्गं चावृत्य तिष्ठति, तस्य चिकित्सामकुर्वतो बाधिर्यं जायते** ( सुउ. २०.८; र. २४.१ ) कर्णरोग. बाधिर्य. बहिरेपणा. मातेच्या अपचाराने किंवा डोहाळे न पुरविल्याने झालेला विकार. जेव्हा कानाच्या मार्गात सकफ वात किंवा शुद्ध वात अडथळा निर्माण करतो, आवरण करतो, तेव्हा जर उपचार केले नाहीत तर बहिरेपणा येतो.

**-त्व**-न., **लक्षण० स्पर्शज्ञानराहित्यम्** ( र. १२.९९ ) बधिरता. स्पर्शज्ञान न होणे.

**रोग० बाधिर्यम्** (र. १२.९९) बाधिर्य, बहिरेपणा.

**बन्दाक**-पु., **वनस्पति० वृक्षादनी** ( सुचि. ६.१३ ) बांडगूळ.

**बन्ध**-पु., **व्रणबन्धनार्थमुपयुक्तं वस्त्रम्, बध्यते व्रणादि अनेन इति बन्धः** ( चचि. २५.९६ ) व्रण बांधण्यासाठी वापरलेले वस्त्र.

**प्रकृतिबन्धः, संसारः** ( चशा. १.४१ ) संसार. प्रकृतीचा पुरुषाशी संयोग म्हणजे बंध.

**विबन्धः, अवरोधः** ( सुसू. ४२.९ ) अवरोध.

**लक्षण० स्रोतोरोधः** ( अहृसू. १०.१२ ) स्रोतसांचा अवरोध.

**सन्धिबन्धः** ( चसू. १८.५१ ) शरिरातील स्थूल सूक्ष्म अतिसूक्ष्म संधीचे बंधन ( कफधातु ).

**संस्कार० पारदबन्धः चाञ्चल्यदुर्ग्रहत्वविनाशसहचरितं पारदस्य स्थिरीभवनम् हठारोटादयः पञ्चविंशतिः पारदबन्धाः** ( र. ११.६० ) पारदाचे चांचल्य वगैरे दोष घालविणारे व स्थिरता प्राप्त करून देणारे २५ बंध. हठ, आरोट, कज्जली इ०

**उपक्रम० बन्धनम्, समन्त्रारिष्टाबन्धोऽव्रणबन्धश्च** ( चसू. १८.५ ) व्रणबंधन, संधिबंधन दंशस्थानाजवळ मंतरलेले किंवा साधे बंधन.

**भूतादिचिकित्सायां रज्ज्वादिभिः समन्त्रैर्बन्धनम्** ( सुउ. ३९.२६५ ) भूतबाधा इत्यादींच्या उपचारात मंत्र म्हणून दोरा किंवा दोरी बांधणे.

**व्रणस्य षष्ट्युपक्रमेष्वेकः, व्रणबन्धनम्, सः त्रिविधः, सम-गाढ-शिथिलभेदात्** ( सुसू. १८.२३; सुचि. १.८; असंसू. ३८.४३ ) **तत्र समो नैव गाढो नैव शिथिलः, स च शाखावदनकर्णकण्ठमेढ्मुष्कपृष्ठपार्श्वोदरोरःसु विधीयते** ( सुसू. १८.२३-२४; अहृसू. २९.६३ ) **गाढः पीडयन्नरुजः, स च स्फिक्कुक्षिकक्षावङ्क्षणोरुशिरःसु विधीयते** ( सुसू. १८.२३-२४; अहृसू. २९.६२ ) **शिथिलः सोच्छ्वासः स चाक्ष्णोः सन्धिषु विधीयते** ( सुसू. १८.२३-२४; अहृसू. २९.६८ ) **बन्धगुणाः—व्रणस्य शुद्धिकरो मृदुत्वकरो निःशङ्करोहणरोपणकृत्** ( सुचि. १.१११ ) **अस्थिसन्धिस्थैर्यकरश्च** ( सुसू. १८.३ ) **वेदनोपशान्तिकरोऽसृक्-**

**प्रसादनश्च** ( सुसू. १८.२८ ) **बन्धाः सङ्ख्यया पञ्चदश, तत्र कोशोऽङ्गुलिपर्वसु चर्मादिकृतः, स्वस्तिकः सन्धिकूर्चभ्रूस्तनान्तरकक्षाक्षिकपोलकर्णेषु, मुत्तोली ग्रीवामेढ्रयोः, चीनमपाङ्गयोः, दाम सम्बाधेऽङ्गे वङ्क्षणादौ, अनुवेल्लितं शाखासु, खट्वा हनुसन्धिगण्डेषु, विबन्ध उदरोरूपृष्ठेषु, स्थगिकाऽङ्गुष्ठाङ्गुलीमेढ्रान्त्रमूत्रवृद्धिषु, वितानं मूर्धादौ पृथुलेऽङ्गे,उत्सङ्गोऽङ्गविशेषे लम्बिनि बाह्वादौ गोष्फणा नासौष्ठचिबुकसक्थिषु, यमको यमलव्रणेषु, मण्डलं वृत्तेऽङ्गे, पञ्चाङ्गी जत्रूर्ध्वे च एषां सर्वेषां बन्धानां स्वनामानुगताकारत्वमवबोध्यम् ।**

( असंसू. ३८.४२; अहृसू. २९.५९ )

व्रणाच्या ६० उपक्रमांपैकी एक उपक्रम ( चिकित्सा ) बंध; तें तीन तऱ्हेने सम, गाढ, आणि शिथिल अशा तऱ्हेने बांधावे लागतात. त्यांचे १५ प्रकार आहेत. ( १ ) कोश ( २ ) स्वस्तिक ( ३ ) मुत्तोली ( ४ ) चीन ( ५ ) दाम ( ६ ) आनुवेल्लित ( ७ ) खट्वा ( ८ ) विंबंध ( ९ ) स्थगिका (१०) वितान ( ११ ) उत्संग ( १२ ) लम्बिनि ( १३ ) गोफण ( १४ ) यमक ( १५ ) वृत्तपंचांगी. हे त्या त्या अवयवानुरूप उपयोगात आणावेत. **समबंध** शाखा, तोंड, कान, घसा, लिंग, वृषण, पाठ, फासळ्या, उदर, उर, यांवर, घट्ट नव्हे पण अगदीच सैल होणार नाही असा बांधलेला असावा. गाढबंध. कुले, कूस, काख, जांघ, मांडी व डोके यांवर बांधतात. ढिला डोळ्यावर व सांध्यावर बांधावा. त्याला शिथिलबंध म्हणतात. बंधाचे **गुण**— व्रण शुद्ध करतो, मऊ ठेवतो, अंकुर येऊन तो लौकर भरून येण्यास मदत होते. हाडांचे सांधे स्थिर करतो, वेदना शमवितो व रक्ताचे प्रसादन करतो.

(१) **कोशबंध**—चामडे इ० चा केलेला. बोटांची पेरी इ० ना बांधण्यासाठी.

(२) **स्वस्तिकबंध**—सांधे, मऊ हाडे, भुवया, दोन्ही स्तनांचा मध्यभाग, काख, डोळा, गाल व कान यांना बांधण्यासाठी.

(३) **मुत्तोलीबंध**—मान, पुरुषजननेंद्रिय, यांचे ठिकाणी उपयुक्त.

(४) **चीनबंध**—अपांग म्हणजे भुवयांच्या शेवटाकडील डोळ्याच्या सांध्यावर बांधण्यास.

(५) **दामबंध**—जांघाडे इ० सारख्या आडसंधीच्या ठिकाणी.

(६) **अनुवेल्लितबंध**—देहाच्या शाखा हात पाय यांच्या ठिकाणी.

(७) **खट्वाबंध**—हनुवटीच्या व गालाच्या संधिस्थानी.

(८) **विबंधबंध**—पोट, मांड्या व पाठीच्या भागाला.

(९) **स्थगिकाबंध**—अंगठा, बोटे, पुरुषजननेंद्रिय, अंतर्गळ आणि वृषणात पाणी साठून झालेली वृषणवृद्धि यांसाठी.

(१०) **वितानबंध**—डोके व इतर पसरट भागावर.

(११) **उत्संगबंध**—विशिष्ट अवयवांवर.

(१२) **लंबिनिबंध**—बाहू वगैरेच्या ठिकाणी.

(१३) **गोफणाबंध**—नाक, ओठ, हनुवटी, पायांच्या ठिकाणी.

(१४) **यमकबंध**—जुळे व्रण असतात तेथे.

(१५) **पंचांगीबंध**—वाटोळ्या अंगभागावर गोल असा. तसेच गळ्याच्या वरच्या भागासाठी उपयुक्त.

**-विधमन**-वि., **सन्ध्यादिबन्धान् विनाशयतीति** ( चसू. २६.४३ )

सांधे व स्रोतसातील अडथळे दूर करणारे. ( लवण. )

**बन्धन**—न., **संस्कार॰ पारदस्य पर्पटी खोटादिरूपः संस्कारः** ( र. १.३४ )

पारदाचे पर्पटी इ० बंधस्वरूपी संस्कार.

**मूषातदाच्छादनयोर्बन्धः** ( र. १०.५ )

मूस व वरचे झाकण बांधणारा बंध.

**संहत्यापादनम्** ( सुसू. ४१.४ (२)) घट्ट बांधणे.

**यन्त्रकर्म॰ रज्ज्वादिना बन्धनम्** ( सुसू. ७.१७; असंसू. ३४.२० ) दोरीने बांधणे.

**ग्रहणम्** ( अहृसू. २६.१७ )

घट्ट बंधनात बसविणे, व्रणबन्धन.

**व्रणबन्धनादौ उपयुक्तं वस्त्रादि द्रव्यम्** ( अहृसू. २९.५७ ) **तत्राविकाजिनकौशेयमुष्णम्, क्षौमं शीतलम्, तूलसन्तानकार्पासस्नायुवल्कजं शीतोष्णम्, मेदःकफाधिके व्रणे ताम्रायस्त्रपुसीसानि, भङ्गे च चर्मवल्ककुशादि प्रयोज्यम्** ( अहृसू. २९.५७ )

व्रण बांधणे—त्यासाठी उष्ण, शीत, शीतोष्ण अशी तीन प्रकारची वस्त्रे घ्यावी लागतात. मेंढी, हरीण यांचे कातडे, रेशीम, उष्ण. ताग थंड. कापूस, स्नायु, झाडाची साल शीतोष्ण. मेद व कफ अधिक व्रणावर व अस्थिभंगावर तांबे, लोखंड, कथील, शिसे आणि भंगावर कातडे, झाडाची साल, दर्भ, कुश इत्यादी योजावेत.

**स्रोतसां बन्धः** ( असंसू. २०.२० )
स्रोतसांचा अवरोध.

**-गुण**-वि., **बन्धनमेव बन्धनरज्जुः, तत्सदृशगुणवान् शरीरे सिरा, कण्डरा मेदात्मकः कफात्मकश्चेति चत्वारो गुणाः** ( असंशा. ५.५३ )
डोळ्यांची हालचाल ज्या बंधनांनी होते ती. ते बंध ४ असून शिरा, कंडरा, मेद व कफ यांनी घटित आहेत.

**-योग्या**-स्त्री., **व्रणपट्टबन्धनाभ्यासः, सा पुस्तमय-पुरुषाङ्गप्रत्यङ्गेषु कर्तव्या** ( सुसू. ९.४ )
जखमेवर पट्टी बांधण्याचा अभ्यास. एक माणसाचा पुतळा घेऊन त्याचे निरनिराळ्या शरीर-अवयवावर करणे.

**बन्धुक**-पु., **वनस्पति० बन्धूकः** ( र. ५.१७४ )
बंधूक, दुपारी.

**बन्धुजीव**-पु., **वनस्पति० बन्धूकः** ( रापरि. १०.३५ ) **पुत्रजीवकः** ( चक्र. चचि. २३.२४३ ) **मूलमस्य शिरोगतविषे नस्यार्थम्** (चचि. २३.१८१) **मध्याह्न-पुष्पकः** ( ड. ) **पुष्पमस्य वमनोपयोगि** ( सुसू. ३९.३; असंसू. ८.५३ ) **मध्याह्नविकाशि-कुसुमम्** ( र.२२.६ ) बंधूक. पुत्रजीवक.
दुपारी. डोक्यात विषाची विकृति असताना नाकात घालण्याकरिता याचे मूळ उपयुक्त. याचे फूल ओकारी करण्यास उपयोगी. माध्यान्ही फुलणारे फूल.

**-फल**-न., **बन्धूकफलम्, वमनेन मूषकविषहरम्** ( असंउ. ४६ ) दुपारीची फळे; उंदराचे विषनाशक.

**बन्धुजीवक**-पु., **वनस्पति० बन्धूकः** ( असंसू. १४.३ )
दुपारी.

**बन्धुर**-पु., **वनस्पति० ऋषभः** ( ध. १. १२५ )
ऋषभ, अष्टवर्गापैकी एक.

**बन्धूक**-पु., **वनस्पति० सितासितपीतलोहितपुष्पविशेषा-च्चतुर्विधः, तद्गुणाः-ज्वरविविधग्रहपिशाचशमनः-सवितृप्रसादनश्च** ( रापरि. १०.३५ ) **पुष्पमस्य श्लेष्मलं ग्राहि** ( असंसू. १२.९० ) **विषसंसृष्टाञ्जने-ऽञ्जनार्थमुपयुज्यते** ( सुक. १.७२ )
हिं.—दुपहरिया, गेजुलिया.
**म.—दुपारी.**
गु.—बपोरिया.
बं.—बान्धुलि फुलेरगाछ.
त.—उच्चित्तिलकम्.
पांढरी, काळी, पिवळी, लाल फुलांची, अशी चार प्रकारची. ज्वर, नाना प्रकारची ग्रहबाधा यांची शामक. पित्तशामक. रक्ताचे प्रसादन करणारी. हिचे फूल कफकर मळ बांधणारे. विषारी अंजनावर अंजन म्हणून उपयुक्त.

**-पुष्पक**-पु., **वनस्पति० असनः** ( ध. ५.१२५ )
राळेचा वृक्ष. असाणा.

**बब्बुल**-पु., **वनस्पति० बब्बूलः** ( र. ५.१७४ ) बाभूळ.

**बब्बूल**-पु., **वनस्पति० बब्बूलः, तद्गुणाः-कषाय उष्णः कफपित्तहृदामरक्तातिसारदाहार्तिनाशनः कासघ्नश्च** ( रापरि. ८.१२; र. १७.५६ )
बाभूळ. कषाय, उष्ण, कफपित्तरोग, रक्तातिसार, आमातिसार, दाहपीडानाशक, खोकलानाशक.

**बब्भुल**-पु.. **वनस्पति० बब्बूलः** ( असंसू. ३.२० )
बाभूळ.

**बभ्रु**-पु., **पक्षि० प्रतुदजातीयः** ( चसू. २७.५१ )
चातक. प्रतुदवर्गातील पक्षी.
**प्राणि० अतिलोमशः कुक्कुरः, पर्वतोपकण्ठे भवति** ( चसू. २७.३५ )
अतिकेसाळ कुत्रा. पर्वताच्या शिखराजवळ असतो.
**बृहन्नकुलः** ( चसू. २७.३५ ) **जाहकः, नकुलः** ( अरु.) **अच्छभल्लः** ( हे. अहसू. ६.४८ )
मोठा मुंगुस. जवादी मांजर. मुंगुस. अस्वल.
**गुहाशयप्राणी** ( ड. सुसू. ४६.७२ )
गुहेमध्ये राहणारा प्राणी.
वि., **कपिलपिङ्गलः** ( सुसू. ६.३५ ) पिंगट.

**-धातु**-पु., **खनिज० सुवर्णगैरिकम्** (रा. १३.२३३)
सोनकाव.

**-पित्त**-न., **नकुलपित्तम्** ( असंसू. ८.१०७ )
मुंगुसाचे पित्त.

**-वर्ण**-पु., **पिङ्गलवर्ण** ( असंसू. ४.५१ ) पिंगट.

**बभ्रू**-पु., **वनस्पति० सुनिषण्णकः** (रा. ४.२०६)
कुरडू.
**प्राणि० गुहाशयः** ( धपरि. ३.६ )
गुहेत राहाणारा प्राणी.

**बरिहिष्ठ**-न., **वनस्पति० वालकम्** ( सुचि. १८.२१ )
वाळा.

**बरुक**-पु., **कुधान्य० कोरदूषकादिगणोक्तमेकं धान्यम्** ( सुसू. ४६.२१ )
क्षुद्रधान्य, बरगे. सावा, बरटी इ०.

**बर्बर**-पु., वनस्पति० भार्गी ( रा. ६.९५ ) भारंगी.
बर्बरगुणाः- कटुक उष्णः सुगन्धिर्विसर्पविष-त्वग्दोषवान्तिनाशनश्च ( रापरि. १०.४८ )
कटु, उष्ण, सुगंधि, विसर्प, विष, त्वचेचे रोग, ओकारी, यांचा नाश करणारी आहेत.

**(बर्बरा)**-स्त्री., वनस्पति० अजगन्धा (ध. २.१००) अजवला, तिळवण, कानफोडी.
न., वनस्पति० कालीयकम् ( रा. १२.१५ ) चंदन.
बोलम् ( ध. ३.६२ ) बोळ.
खनिज० हिङ्गुलम् ( रा. १३.४७ ) हिंगूळ.
चन्दनभेदः, बर्बरगुणाः- शीतलं तिक्तं त्रिदोषघ्नं कुष्ठकण्डूव्रणघ्नं विशेषाद् रक्तदोषघ्नम् (रा. १२.१७)
पिवळे चंदन. पांढरे चंदन. गुण-थंड, कडु, त्रिदोष-नाशक, कुष्ठ, खाज, व्रणनाशक, विशेषतः रक्त-दोषनाशक.
वि., कृष्णवर्णम् ( र. ५.१९६ ) काळसर रंगाचे.

**बर्बरक**-न., चन्दन० बर्बरम् ( रा. १२.१७ ) चंदन.

**बर्बरिक**-न., चन्दन० बर्बरम् ( ध. ३.९ ) चंदन.

**बर्बरोत्थ**-न., चन्दनभेदः बर्बरम् ( रा. १२.१७) चंदनाचा प्रकार.

**बर्बरोद्भव**-न., चन्दनभेदः बर्बरम् ( ध. ३.९ ) चंदनापासून झालेले.

**बर्बुर**-पु., वनस्पति० बब्बूलः ( रापरि. ८.१२ ) बाभूळ.

**( बर्बुरा )**-स्त्री., वनस्पति० तरटी ( रापरि. ८.३२ ) तरटी. तांबड्या बियांची वनस्पती.

**बर्बूर**-पु., वनस्पति० बब्बूलः ( र. १७.६९-७५ ) बाभूळ.

**( बर्बूरी )**-स्त्री., वनस्पति० बब्बूलः ( र. ३.१३१ ) बाभूळ.

**बर्ह**-न., पिच्छम् ( ड. सुक. ८.७२ ) पीस, पिसारा.

**बर्हण**-न., वनस्पति० तगरम् (रा. १०.१०२; असंसू. ८.२९ ) तगर.

**बर्हि**-पु., वनस्पति० कुशः ( ध. ४.१३३ ) दर्भ.

**बर्हिन्**-पु., पक्षि० मयूरः ( चसू. २७.४८ ) मोर.

**( बर्हि )-चूड**-न., सुगन्धिद्रव्य० स्थौणेयम् ( ध. ३.६९ ) थुणेर. गाजर, गंठीवन.

**-( चूडा )**-स्त्री., वनस्पति०तद्गुणाः-स्वादुर्वश्यकर्मणि शस्ता मूत्रकृच्छ्रविनाशिनी बालग्रहादिदोषघ्नी च ( रापरि. ५.१३ )
( मयूरशिखा ) मोराच्या शेंडीसारखी वनस्पती-गुण-स्वादु, वश करण्याचे कामामध्ये योग्य, मूत्रकृच्छ्रनाशक, बालग्रहादींचे दोष नाहीसे करणारी.

**-जङ्घ**-पु., वनस्पति० टिण्डुकः ( रा. ९.१४३ ) टेंटू.

**-पत्रभस्मन्**-न., मयूरपिच्छभस्म, इदं हिक्काशमनार्थं लेह्यम् ( सुउ. ५०.२० )
मोराच्या पिसाचे भस्म. उचकीनाशक चाटण्याचा औषधीप्रयोग.

**-पित्त**-न., भैषज्य० मयूरपित्तम्, सर्वविषशमनार्थ-मुपयुज्यते ( चचि. २३.२१७ ) श्वित्रे लेपार्थमुप-युज्यते ( चचि. ७.१७० ) नेत्ररोगेषूपयुज्यते ( असंउ. १६ ) द्र० ' मयूर '
मोराचे पित्त. सर्वविषनाशक. कोडावर लेपाकरिता उपयुक्त. डोळ्याच्या रोगावरही उपयुक्त.

**-पुष्प**-न., वनस्पति० शिरीषः ( रा. ९.१८८ ) शिरीष. सिरसाचे फूल.

**-शब्द**-पु., बर्हिसंज्ञा नाम मयूराभिधानम् ( चचि. ८.१५० ) बर्हि हे मोराचे नांव.

**-शिख**-न., सुगन्धि० स्थौणेयम् ( रा. १२.१२५ ) गाजर, गंठीवन.

**बर्हिण**-पु., पक्षि० मयूरः ( सुचि. ३५.७ ) मोर.

**बर्हिणाण्ड**-पु., मयूर्या अण्डम्, वाजीकरणार्थमुपयुज्यते (असंउ. ५०) लांडोरीचे अंडे. शुक्रवृद्धीकरता उपयुक्त.

**बर्हिष**-पु., पक्षि० मयूरः ( असंशा. ३.३६ ) मोर.
वनस्पति० अपामार्गः ( असंशा. ३.३६ ) आघाडा.

**बर्हिष्ट**-न., वनस्पति० नेत्रवालकम्, कफज्वरहरतैलोक्तं द्रव्यम् ( काखिल. ११.१३६ ) वाळा, नेत्रवाळा.
कफज्वरनाशक तेलासाठी उपयोगी द्रव्य.

**बर्हिष्ठ**-न., वनस्पति० वालकम् ( ड. ) श्लेष्माभिष्यन्दे-ऽनुलेपार्थमुपयुज्यते ( सुउ. ११.६ ) वाळा.
कफाने आलेल्या डोळ्यावर लेपाकरिता उपयुक्त.

**बल**-पु., भैषज्य० नखम् ( रा. १२.१०७ ) नख, खूर.

**( बला )**-स्त्री., वनस्पति० बल्यगणोक्तमेकं द्रव्यम् ( चसू. ४.१० ) साङ्ग्राहिकबल्यवातहराणां श्रेष्ठा ( चसू. २५.४०; असंसू. १३.३ ) सरक्तपवने प्रदेहोपयुक्ता ( चसू. ३.२१ ) मूलमस्या आस्थापने उपयुज्यते ( चसू.२.१२ ) तद्गुणाः-मधुरा अति-तिक्ता ( रा. ) शीता, स्निग्धा वृष्या बल्या, ओजो-वर्धिनी त्रिदोषघ्नी ( पित्तघ्नी रा. ) रक्तपित्तक्षया-तिसारकफरोगघ्नी च ( ध. १.२८० )

हिं.—खिरैटी.
**म.—लघुचिकणा.**
गु.—बलादाणा.
बं.—वेडेला.
त.—चिनामुद्दि.
चिकणा—बल्यगणातील एक द्रव्य. संग्राहक, बल्य, वातहर द्रव्यामध्ये श्रेष्ठ आहे. सरक्त वातात लेपाकरिता. शोधक बस्तीत मूळ उपयुक्त. गुण—मधुर, अतिकडु, शीत, स्निग्ध, पौष्टिक, बलकर, ओजोवर्धक, त्रिदोषनाशक, रक्तपित्त, क्षय, अतिसार, कफरोगनाशक आहे.
**शाक० वातघ्न्यतिसारजिच्च** ( असंसू. ७.१४८ )
चिकण्याची भाजी वातघ्न आणि अतिसारनाशक आहे.
**मध्यमपञ्चमूलेष्वेकम्, वाट्यालकः**
( हे अहृसू. ६.१६९ )
चिकणा. मध्यम पंचमूलापैकी एक.
**वनस्पति० ताम्बूली** ( धपरि. ३.१ )
तांबूली, विड्याचे पान.
**आर्तगला** ( रा. १०.४१७ ) आर्तगला. कोन्हांटी.
**राजबला** ( रा. ४.४३३ ) चिकणा.
**जटामांसी** ( र. २९.७१ ) जटामांसी.
**खनिज० कांस्यम्** ( ध. ६.२३ ) कासे.
न., **हृदि स्थितमोजः, सप्तधातुधामभूतम्**
(ड. सुउ. ४१.१९ )
हृदयातील ओज. सातही धातूंचे तेजोभूत द्रव्य.
**उत्साहः** ( ड. सुचि. ३३.२७ ) उत्साह.
**देहोपचयः** ( सुचि. २६.३९ ) शरिराची पुष्टी.
**प्राणः** ( अरु. अहृसू. २.१६ )
प्राण, जीव, शक्ति.
**सामर्थ्यम् क्रियानिर्वर्तनक्षमता** ( चसू. १२.१७; सुसू. ५.२५ ) **बलं व्यायामशक्त्या परीक्षेत** ( चवि. ४.८ ) **बलं त्रिविधं सहजं कालकृतं युक्तिकृतं च, सहजं देहसत्त्वयोः प्राकृतम्, कालकृतं ऋतुविभागजं वयःकृतं च, युक्तिकृतमाहारविहारोत्थमूर्जस्करं योगजं च** ( असंशा. ८.२८ )
**विसर्गादानोपलक्षितकालकृतं च बलं हेमन्तशिशिरयोश्चाग्र्यम्, शरद्वसन्तयोर्मध्यम्, वर्षानिदाघयोर्हीनं च** ( असंसू. ४.४ )
सामर्थ्य– ताकत. क्रिया कार्य करण्याचे बळ. हे व्यायामशक्तीने ओळखावे. सामर्थ्य तीन प्रकारचे. ( १ ) जन्मतः शरीरमनाचे असलेले ते सहज. ( २ ) वय व ऋतु यांनी निसर्गतः मिळालेले ते कालकृत. तारुण्यात व विसर्गकालात वाढणारे. ( ३ ) आहार, विहार, व्यायाम शक्तिवर्धक योग, यांचे युक्तीने सेवन केल्यामुळे आलेले ते युक्तिकृत. हेमंत व शिशिर यात सर्वात अधिक; शरद व वसंतात मध्यम आणि वर्षा व ग्रीष्म यात सर्वात कमी बळ असते.
**–करण**–न., **बलस्य वर्धनम्, शक्त्युपचयः**
( सुसू. ११.१५ )
बळ वाढविणे, बलवर्धक, शक्ति सांचविणे.
**–क्षय**–पु., **लक्षण० ओजोहानिः** (सुसू. १५.२३,२८) **त्रिविधबलहानिः** ( सुउ. ३९.१०५)
ओजाची हानि. कालज, युक्तिज आणि सहज ह्या तिन्ही प्रकारच्या बळाची हानि.
**–त्रिक**–न., **त्रिविधं शारीरं बलम् प्रवरावरमध्यभेदात्**
( चचि. २४.६८ )
बलाचे तीन प्रकार ( १ ) उत्कृष्ट ( २ ) निकृष्ट ( ३ ) मध्यम.
**–त्रैविध्य**–न., **हीनमध्योत्तमभेदात् त्रिप्रकारकं बलम्** ( चक. १२.६० ) तीन प्रकारचे बल. हीन मध्यम व उत्तम.
**–द**–पु., **वनस्पति० जीवकः** ( रा. ५.११५ )
जीवक, अष्टवर्गापैकी एक.
**(–दा)**–स्त्री., **वनस्पति० अश्वगन्धा** ( रा. ४.४०१ )
आस्कंद.
**–दान**–न., **सामर्थ्याधानम्** ( अहृसू. १२.१२ )
स्वजातीय अन्य पित्तांना बल देणे ( पाचक पित्ताचे कार्य ).
**–देवा**–स्त्री. **वनस्पति० त्रायमाणा** ( ध. १.२५४ )
त्रायमाण.
**–नख**–न., **भैषज्य० व्याघ्रनखम्** ( रा. १२.११० )
व्याघ्रनख, वाघाचे नख.
**–पति**–पु., **देव० इन्द्रः** ( सुसू. ५.२५ ) इंद्र.
**–प्रणाश**–पु., **लक्षण० शक्तिहानिः** ( चसू. १६.१५)
शक्तिनाश.
**–भद्र**–पु., **वनस्पति० कदम्बभेदः, धूलीकदम्बः**
( रा. ९.१७३ ) द्र० ' कदम्ब ' कदंबप्रकार.
**(–भद्रा)**–स्त्री., **वनस्पति० त्रायमाणा** ( ध. १.२५४ )
त्रायमाण.
**–भ्रंश**–पु. **लक्षण० शक्तिनाशः** ( अहृसू. १३.२३ )
बलाचा नाश.
**–वत्**–वि., **उपचयशक्तिलक्षणोभययुक्तः** ( सुचि. ५.६)

**सर्वक्लेशसहः** ( सुसू. ३४.२४ ) **मनोबलयुक्तः, सत्त्वभूयिष्ठः** ( सुचि. ६.४ )
शरीराची पुष्टी आणि शक्ति यांनी युक्त. सर्व क्लेश सहन करणारा, मनोबलाने युक्त, सत्वगुणाधिक.

**(-वती)** स्त्री., वनस्पति० **एलाभेदः, सूक्ष्मैला** (रा. ६.६८) द्र० '**एला**' लहान वेलदोडा.

**-वद्विग्रह**-पु., **बलिना सह युद्धम्** ( सुसू. २६.६ )
बलवान माणसाशी युद्ध.

**-वर्णहानि**-स्त्री., **बलवर्णयोर्नाशः** ( चशा. ४.२२ )
बलवर्ण यांचा नाश.

**-वर्धन**-वि., **सामर्थ्यवृद्धिकृत्** ( चसू. १.८७; चसू. ३०.१५ ) सामर्थ्य वाढविणारा.

**-विभ्रंश**-पु., **लक्षण०** **बलनाशः** ( सुचि. ३४.७ )
बलनाश.

**-विस्रंस**-पु., लक्षण० **बलहानिः** ( सुसू. १५.२५ )
बलक्षय.

**-व्यापद्**-स्त्री., **बलस्यापचयः** ( ड. सुउ. ३९.१२५ ) **तल्लक्षणम्- गुरुत्वमङ्गेषु स्तब्धता ग्लानिर्वर्णभेदनं तन्द्रा निद्रा वातशोफश्च** ( सुसू. १५.२७ )
बलाचा ऱ्हास, अंगाचे जडत्व, स्तब्धता, थकवा, वर्ण बिघडणे, गुंगी, झोप व वात वाढून सूज येणे, हीं बलाच्या ऱ्हासाची लक्षणे आहेत.

**-संक्षय**-पु., लक्षण० **शक्तिह्रासः** ( अहृसू. ७.२४ )
शक्तीचा नाश.

**-संधान**-वि., **शक्तिकरम्, शरीरस्य बलेन सह सन्धानं संहतिं योगं वा करोतीति** ( चसू. ५.९४ )
शरिरात बल निर्माण करणारे.

**-संभव**-पु., धान्य० **व्रीहिः** (रा. १६.१०१) तांदूळ.

**-समाधान**-वि., **बलेन सम्यगाधीयते धार्यते इति** ( चनि. ६.५ )
बळाने धारण केले जाणारे, ठेवले जाणारे.

**-साम्य**-न., **बलस्य तुल्यता** ( चसू. २६.७३ )
बलाशी समान.

**-ह्रास**-पु., लक्षण० **शक्तिक्षयः** ( चचि. ३०.२४२ )
शक्तीचा ऱ्हास.

**बला**-स्त्री., ( ध.१.२८० ) चिकणा.

**-जल**-न., **बलासिद्धं शीतजलम् पित्तरक्तशमनमिदम्** ( चचि. ४.७८ )
चिकणासिद्ध थंड पाणी. हे रक्तपित्तशामक आहे.

**-तैल**-न., तैल० **बलागुडूचीरास्नाशटीसरलादिनिर्मितं तैलम्, तच्छ्वासकासज्वरहिक्काच्छर्दिगुल्मक्षतक्षयप्लीहशोषापस्मारालक्ष्मीघ्नं वातव्याधिविनाशनं च** (चचि. २८.१४८-१५६) **धन्वन्तरिसम्मतमिदं तैलं सूतिकाकृशशिशुवतिवयःसुकुमारशूलिमहाग्रहगृहीतदीर्घरोगक्षपितवपुर्मर्मविद्धपतिताभिहतभग्नविश्लिष्टदेहिनां पाननावनाभ्यङ्गबस्तिषु प्रयोज्यम्, एतत् पौरुषस्मृत्यग्निमेधावीर्यौजोवर्धनम्, आक्षेपकार्धकादिविविधवातविकारनुदन्त्रवृद्धिनुद् वन्ध्यानां पुत्रदं च** (असंशा. ४.५१; असंशा.३.३८; सुचि. १५.२९-३९ ) **मृदिते गुह्यरोगे सेचनार्थम्** ( असंउ. ३९ ) **अशीतिवातविकारविंशतियोनिदोषरजोदोषग्रहशमनम्** ( काधात्रीचि. ) **शतपाकं बलातैलं वन्ध्यानां बस्त्यर्थमुपयुज्यते**(सुचि.३८.८९) **शतपाकं सहस्रपाकं वा बलातैलं जीवनं बृंहणं स्वर्यमिन्द्रियप्रसादनं वातासृग्वातरोगनुच्छुक्रासृग्दोषनाशनं श्रेष्ठं रसायनं च** ( चचि. २९.११९१-२०,
बलातेल नावाचे सिद्धौषध. चिकणा, गुळवेल, रास्ना) कचोरा इत्यादींनी सिद्ध तेल. ते श्वास, खोकला ज्वर, उचकी, ओकारी, गुल्म, उरःक्षत, क्षय, प्लीहा, शोष, अपस्मार, चेहऱ्याचा मळकटपणा व वातरोगनाशक. हे धन्वंतरीला मान्य आहे. बाळंतीण, कृश बालक, अतिवृद्ध, सुकुमार, शूळ असलेला, मोठ्या ग्रहाने पीडलेला, दीर्घ रोगाने क्षीण, मर्मावर आघात, हाड फुटलेला, सांधा निखळलेला, यांना पिणे, अभ्यंग, नाकात घालणे, बस्ति देणे यात उपयुक्त. हे पुरुषत्व, स्मृति, अग्नि, धारणाशक्ति, वीर्य, ओज वाढविणारे, आचके, अर्धे डोके दुखणे, नाना प्रकारचे वातविकार अंतर्गळ नाशक असून वांझ स्त्रियांस पुत्र देणारे व गुह्यरोगात शिंपडण्यासाठी, धार धरणे इ० कामात उपयोगी. ऐशी वातविकार, वीस योनिदोष, वेदना, ग्रहबाधा शामक. वंध्या स्त्रीला बस्ति देण्यास उपयुक्त.
शतपाकीप्रमाणेच सहस्रपाकी बलातेल हे पौष्टिक जीवनाला आवश्यक, स्वर चांगला ठेवणारे, इंद्रिये निर्मल करणारे, वातरक्त वातरोग शुक्र व रक्तदोषनाशक, व रसादि धातूंचे सारत्व निर्माण करणारे श्रेष्ठ तेल आहे.

**-त्रय**-न., वनस्पति० **बला ऽतिबला, नागबला च** ( अहृसू. १०.२३ ) **तद्गुणाः-स्वादु वृष्यं स्निग्धं शीतं बलप्रदं च** ( असंसू. १२.८२ )

तीन बला. बला, अतिबला, नागबला. **गुण**—गोड स्निग्ध, थंड, बलप्रद व शुक्रधातूला हितकर.

**-द्वय**-न., **बलाऽतिबला च, एतद् वायुं नाशयति** ( अहसू. १५.५ )
बला व अतिबला हे चिकणा वनस्पतीचे प्रकार आहेत; हे दोन्ही वातनाशक.

**-पञ्चक**-न., **बलाऽतिबला नागबला महाबला राजबला च, पञ्चकमेतन्मधुरं स्निग्धं ग्राहि बल्यं वृष्यमायुष्यं पित्तवातघ्नं मूत्रकृच्छ्ररक्तप्रदरघ्नं च** ( ध. १.२८७ )
बलापंचक—बला, अतिबला, नागबला, महाबला, राजबला. या पाच प्रकारच्या बलांचे **गुण**—गोड, स्निग्ध, मळ घट्ट करणाऱ्या, बलवर्धक, वातपित्तनाशक, आयुष्यकर, शुक्राला हितकर, कष्टाने लघ्वीला होणे व रक्तप्रदरनाशक आहेत.

**-मूल**-न., **बलाया मूलम् अक्षप्रमाणोपसेवितमिदं पाण्डुरोगशमनमेतत्** ( सुउ. ४४.२६ )
बला-चिकणामूळ पांडुरोग नाशक. एक तोळा प्रमाण.

**-यूष**-पु., **कल्प० बलातिबलाकृतः, वातघ्नोऽयम्** ( काखिल. ४.५३ )
चिकणामुळाचे कढण हे वातघ्न आहे.

**-रसायन**-न., **योग० कुटीप्रावेशिके बलामूलम् अर्धपलं पलं वा पयसाऽऽलोडितं सेव्यम्, बलकामानां शोषिणां रक्तपित्तिनां शोणितोद्वमिनां विरिच्यमानानां च सेव्यत्वेन प्रशस्तम्** (सुचि २७.१० )
बलारसायन. एक औषध. कुटीप्रावेशिक रसायनविधीतील. दुधाबरोबर त्यात घोळून चार किंवा दोन तोळे घ्यावे. बल उत्पन्न व्हावे अशांना व क्षयी रक्तपित्ती, रक्त ओकणारे, व रक्तातिसारी यांना सेवन करण्यास योग्य.

**बलाका**-स्त्री., **पक्षि० प्लवजातीया, सङ्घातचारिणी पवनकफप्राया** (चक. १.८; सुसू. ४६.१०५ )
**इयं वारुण्या कुल्माषैश्च सह संयोगेन सेवने विरुद्धा** (चसू. २६.८४;सुसू.२०.१३;अहसू.७.४२)
बगळी. समुदायाने राहणारी, पोहणारी, कफवातप्राय-पक्ष्याची जात. हिचे मांस वारुणी मद्याबरोबर, वाटाण्याबरोबर खाणे विरुद्ध आहे.

**-भव**-वि., **बलाकायां भवं जायमानं बलाकासम्बन्धि (पक्षादि)** ( सुचि २५.३० )
बगळ्यापासून झालेले. पंख, पीस, मांस इत्यादी.



**-भवपत्र**-न., **बलाकापक्षं इदं सम्यक्सिद्धतैलपरीक्षणोपयोगि, तैले न्यस्तं नीलवर्णं भवेत् तदा तत् तैलं सम्यक्सिध्दमिति ज्ञेयम्** ( सुचि. २५.३० )
बगळ्याचे पंख. हे चांगले तयार झालेले तेल पारखून पाहण्याकरिता उपयोगी. हे पीस तेलात टाकले असता जर निळे झाले तर तेल चांगले झाले असे समजावे.

**बलाकास्थि**- न., **बलाकाया अस्थि, एतदीयो धूपो विषघ्नः** ( असंसू. ८.११९ )
बगळ्याचे हाड. याची धुरी विषनाशक.

**बलाढ्य**-पु., **वनस्पति० माषः** ( ध. ६.९९ ) उडीद.

**( बलाढ्या )**-स्त्री., **वनस्पति० बला** ( रा. ४.४२२ )
चिकणा.

**बलादिघृत**-न., **घृत० बलास्थिरादिसिद्धं सर्पिः, ज्वरकासघ्नं स्वर्यं चैतत्** ( चचि. ८.११४-११६ )
बलादितूप, चिकणा, शिवण इ० नी सिद्ध तूप. स्वराला चांगले. ताप व खोकलानाशक.

**बलादिसर्पिस्**-न., **घृत० बलाकोलादिनिर्मितं घृतम्, मूत्रदोषहरमेतत्** ( सुउ. ५८.५८-६२ )
बलादितूप. चिकणा बोर इत्यादी युक्त ( सिद्ध ) तूप. मूत्रदोषहारक.

**बलाधान**-न., **शक्तिसम्प्राप्तिः, बलप्राप्तिः, शक्त्याधानम्** ( चक. १२.४७ ) बलाची प्राप्ति. शक्ति येणे.

**बलाधिष्ठान**-वि., **बलमधिष्ठानं यस्य तद् (आरोग्यादि)** ( चचि. ३.१४२ )
बलाचे स्थान, निरोगित्व.

**बलामोटा**-स्त्री., **वनस्पति० जयन्ती, तद्गुणाः-तिक्ता कटुरुष्णा कण्ठविशोधनी त्रिदोषघ्नी विषगलगण्डभूतघ्नी च** ( धपरि. ४.१ ) **कृष्णा बलामोटा रसायनी** ( रा. ४.२ )
हिं.—जैत.
**म.—शेवरी.**
बं.—जन्ती.
त.—पीनारिचिंकु.
शेवरी. गुण—कडु तिखट, उष्ण, गलगंड, भूतबाधा नाशक. काळी शेवरी रसायनी.

**बलार्धलक्षण**-न., **अर्धशक्तेर्व्यायामस्य लक्षणम्; यदा हृदि स्थानस्थितो वायुर्वक्त्रं प्रपद्यते तद् बलार्धलक्षणम्** ( सुचि. २४.४७-७८ ) **कक्षाललाटनासासु हस्तपादादिसन्धिषु प्रस्वेदो मुखशोषश्च बलार्धलक्षणम्** ( ड. सुचि. २४.४७ )

व्यायाम करताना अर्धे बल वापरावे असे सांगितले आहे. म्हणजे जेवढी आपली पूर्ण शक्ति असेल त्याच्या निम्मी शक्ति संपली म्हणजे व्यायाम थांबवावा. हृदयातील वायू नाकातून न जाता तोंडातून जातो-तोंडाने श्वासोच्छ्वास करावा लागतो किंवा काख, कपाळ, नाक, हातपाय इत्यादी संधीत घाम व तोंड सुकणे हे अर्धे बळ खर्च झाल्याचे लक्षण आहे.

**बलाश**-पु., रोग० गलरोगः बलासः ( मा. मुखरोगनि. ) गळ्याचा रोग.

**बलास**-पु., दोषः, कफः ( सुउ. ६१.३३; असंसू. २८.१५ ) कफ.
**गलरोगः, तत्सम्प्राप्तिलक्षणम्-प्रवृद्धौ श्लेष्मानिलौ गले श्वासरुजोपपन्नं मर्मच्छिदं दुस्तरं शोफं कुरुतः, तेन कण्ठोपघातो भवति** ( सुनि. १६.५४; र. ३.९० )
गळ्याचा रोग. संप्राप्तिलक्षणे-वाढलेले कफवात गळ्यात मर्मभेदक वेदनायुक्त श्वासकारक व उपचारास त्रासदायक अशी सूज उत्पन्न करतात; त्यामुळे घसा बंद होतो.

-**क्षतजप्रसूत**-वि., **श्लेष्मरक्तसम्भवं ( श्वयथ्वादि )** ( सुनि. १६.५५ )
कफरक्तापासून झालेले ( सूज इत्यादी विकार ).

-**ग्रथित**-न., **नेत्ररोग० कफजोऽयम्, तल्लक्षणम्-नेत्रस्य सिते भागे कांस्याभोऽम्बुबिन्दुतुल्यो मृदुः अरुजः शोफो भवति** ( सुउ. ४.९ ) **स सवर्णो बहलो गुरुः स्निग्धश्चेति** ( असंउ. १३ ) **साध्योऽयम्** ( सुउ. ४.४-९ )
कफग्रथित हे नेत्ररोगाचे नाव. **लक्षणे**-डोळ्याच्या पांढऱ्या भागावर काशाच्या रंगासारखे पाण्याच्या थेंबाप्रमाणे मऊ वेदनारहित सूज होते. तो रोग पांढऱ्या रंगाचा मोठा जड व स्निग्ध असतो. तो साध्य असतो.

-**जित्**-वि., **कफघ्नो गणः, आरग्वधादिरर्कादिर्मुष्ककादिरसनादिमुस्तादिर्वत्सकादिः सुरसादिश्च** ( अहसू. १५.७ )
कफनाशक गण. बहावा इ० रुई इ० मोखा इ० असाणा इ० नागरमोथा इ० कुडा इ० व तुळस इ०

-**प्रकृति**-वि., **कफप्रकृतिकः** ( सुशा. ४.७४ )
कफप्रकृतीचा.

**बलासक**-पु., **विंशतिश्लेष्मविकारेष्वेकः, श्लेष्मोद्रेकान्मन्दज्वरितत्वम्** ( चसू. २०.१७ )
कफाच्या वीस विकारांपैकी एक विकार, बलासक. कफाच्या उद्रेकाने मंद ज्वर येणे.
बलक्षयः ( चसू. २०.१७ ) बलाचा क्षय.
**नेत्ररोग० बलासग्रथितम्, अस्य विदेहोक्तं लक्षणम्-मारुतात् पीडितः श्लेष्मा शुक्लभागे व्यवस्थितो जलबिन्दुरिवोच्छूनो मृदुश्च भवति** ( सुउ. ४.९ )
नेत्ररोग. वात कफ हे दोष डोळ्याच्या पांढऱ्या भागावर एके ठिकाणी गोळा करून पाण्याच्या थेंबासारखी मऊ सूज करतात.

**बलासावतत**-वि., **श्लेष्मच्छन्नम्** ( सुउ. ४३.८ )
कफाने व्यापलेले.

**बलाहक**-पु., **सर्प० दर्वीकरः** ( सुक. ४.३४ (१) )
फणायुक्त, नाग, सर्प.

**बलाहलक**-न., **कन्दविषम्** ( असंउ. ४० )
बलाहलक, विषारी कंद.

**बलाह्वया**-स्त्री., **वनस्पति० बला** ( रा. ४.४३२ )
बला, चिकणा.

**बलोत्तरा**-स्त्री., **वनस्पति० बला** ( रा. ४.४३२ )
बला, चिकणा.

**बलि**-पु., **व्यालाचार्यचन्द्रसेनादीनां प्राचीनरसाचार्याणामेकतमः** ( र. ६.४९ )
बली नांवाचे प्राचीन काळातील रसायन शास्त्रातील व्यालाचार्य चंद्रसेन इ० प्राचीन आचार्यांपैकी एक.
**नृप० वामनेन पाताले निहितो राजा** ( र. ३.१८ )
बलिराजा, वामनाने पाताळात दडपलेला.
**खनिज० गन्धकः** ( र. २.९४ ) गंधक.
**अथर्ववेदे प्रोक्तानां चिकित्साविशेषाणामेकतमः, आहुतिः** ( चसू. ३०.२१ )
अथर्ववेदात सांगितलेली यज्ञातील एक रोगनाशक आहुति.
**पूजोपहारः, बल्यते दीयते देवतायै इति बलिः** ( सुसू. ५.७ ) देवतेला बळी देणे.
**सपशुनैवेद्यः** ( ड. सुक. ५.१२ )
पशूसह देवतेला द्यावयाचा नैवेद्य.

-**भुज्**-वि., **बलिं भुङ्क्ते इति बलिभुक् ( वायसादिः )** ( चइ. ११.४ )
बळी म्हणजे पिंड वगैरे खाणारे (कावळे इ०)

-**भू**-स्त्री., **पशुहननस्थानम्** ( असंसू. ३.४४ )
बळी देण्याचे ठिकाण.

**–भृत्**–वि., **बलिं विधिवद्दत्तमन्नं बिभर्ति पोषणार्थं धारयति इति बलिभृत् नाम बलिभुक् (वायसादिः)** ( चइ. ११.४ )बली द्रव्यावर जगणारे कावळे वगैरे.

**–वत्सा**–स्त्री., **खनिज० गन्धकः** (ध.३.१०९) गंधक.

**–वसा**–स्त्री., **खनिज० गन्धकः** ( र. ३.१९ ) गंधक.

**बलिका**–स्त्री., **वनस्पति० अतिबला** ( ध. १.२८६ ) अतिबला, चिकणाप्रकार.

**बलिन्**–वि., **शक्त्युपचययुक्तः** ( सुसू. ४६.४४५; अहृसू. २७.१८ ) बलवान्, शक्तिपुष्टियुक्त.
**खनिज० गन्धकः** (र. ३.९०; ध. ३.१०९) गंधक.
**वनस्पति० कुन्दुरुः** ( ध. ३.१३१ ) पालख.

**बलीवर्द**–पु., **पशु० वृषभः** ( ध.६.४०५ ) बैल.

**बल्य**–वि., **बलाय नाम बलवृद्धये हितं तद् बलकरम्, बलवर्धनम्** (चसू. १.१०७; र. २.३) **ऐन्द्र्यृषभ्यतिरसर्ष्यप्रोक्ता पयस्याऽश्वगन्धा स्थिरा रोहिणी बलाऽतिबला चेति दशेमानि बल्यानि** (चसू.४.१०) शक्तिवर्धक गोरखकाकडी ( चिभडे ), कुहिली, शतावरी, रानउडीद, भुईकोहळा, आस्कंद, सालवण, शिवण, चिकणा, मोठा चिकणा, ह्या दहा वनस्पती बलवर्धक.

( **बल्या** )–स्त्री., **वनस्पति० अतिबला** ( रा. ४.४३० ) अतिबला.
**बला** ( रा. ४.४३२ ) चिकणा.
**अश्वगन्धा** ( ध. १.२७२ ) आसकंद.
**प्रसारणी** ( रा. ५.४३५ ) चांदवेल.

**–दशक**–पु., **बलकरो दशौषधगणः, ऐन्द्रातिरसापयस्यादिः** ( असंसू. १५.१२ ) बलवर्धक दहा औषधांचा वर्ग. ( ऐंद्री अतिरसादि वर सांगितलेले ).

**बल्वज**–पु., **तृणविशेषः** ( चशा. ८.३४; सुशा. ५.४९ ) लव्हाळा, मोळ.

( **बल्वजा** )–स्त्री., **वनस्पति० तद्गुणाः–मधुरा शीता वातकोपनी रुच्या कण्ठशुद्धिकरी पित्तघ्नी पित्तदाहतृषापहा च** ( रापरि. ८.४० ) लव्हाळी, मोळ. **गुण**–गोड, थंड, रुचीला हितकर, घसा शुद्ध करणारी, पित्त, दाह व तहान नाशक; वातवर्धक वनस्पती.

**बस्त**–पु., **पशु० ग्राम्यवर्गीय अजः, मेषः** ( सुसू. ४६.८५; र. २१.६० ) बोकड, मेंढा.

**–कर्ण**–पु., **वनस्पति० सर्जकः** ( ध. ५.१२३ ) राळेचा वृक्ष.

**–गन्धा**–स्त्री., **वनस्पति० अजगन्धा** ( सुचि. ३७.१६ ध. २.१००; असंसू. ७.१५८ ) तिळवण, कानफोडी.
**बोथयिका** ( ड. सुउ. ३४.६ ) बोथयिका–धूपासाठी उपयोगी.
**बोबयिका** ( ड. सुउ. २१.६ ) बोबयिका–कर्णशूलात स्वेद देण्याच्या उपयोगी.

**–गन्धित्व**–न., **लक्षण० बृहत्तमबस्तसमानगन्धित्वम्, इदमश्मर्यामेकं पूर्वरूपम्** ( सुनि. ३.५ ) माजलेल्या बोकडाच्या अंगाच्या वासासारखा वास येणे; मूतखड्यामधील एक चिन्ह.

**–मार**–पु., **छगलवन्मरणम्, ग्रीवावमोटनेनाशुतममक्लिष्टमरणम्** ( सुनि. ८.१४ ) बोकडास खाटीक कमी त्रासात मृत्यु आणतो ती कृति. मान मुरगळून मरण.

**–मूत्र**–न., **छागमूत्रम्** ( सुचि. १२.४ )बोकडाचे मूत्र.

**–मोदा**–स्त्री., **वनस्पति० अजमोदा** ( ध. २.९८ ) अजमोदा.

**–शिरस्**–न., **छागमस्तकम्** ( चसू. १४.२९ ) **बस्तशिरसः क्वाथो नाडीस्वेदार्थमुपयुक्तः** (चचि. ८.७३) बोकडाचे डोके. याचा काढा, नळीने शेकण्यास उपयुक्त.

**बस्ताण्ड**–पु., न., **छागाण्डम्, बस्तस्य वृषणः** ( सुचि. २६.१८ ) **वाजीकरणार्थमुपयुज्यते** ( असंउ. ५० ) बोकडाचा अंड, शुक्रवृद्धीकरता योजतात.

**बस्तान्त्रि**–स्त्री., **वनस्पति०** ( ध. परि. १.१ ) बोकडी.
वृषगन्धा ( अरु. अहृसू. १५.४५ ) वृषगन्धा. एक बला ( चिकण्याचा प्रकार ).
**वृद्धदारुकः** ( हे. अहृसू. १५.४५ ) वरधारा.
**बस्तान्त्रीगुणाः–तिक्ता कषाया मधुरा कटुः शीता लघुर्वातकोपनी बीजदा गर्भजननी कासघ्नी च**
हिं.—बोकडी.
**म.—बोकडी.**
गु.—पुंगळ.
( रा. ३.३ )
ही कडु, तुरट, गोड, तिखट, थंड, हलकी, बीजदायक, गर्भस्थापक, खोकलानाशक व वातप्रकोपक.
**वृषगन्धा** ( अरु. अहृसू. १५.४५ ) वृषगंधा. एक बला ( चिकण्याचा प्रकार ).

**बस्ति**–पु., **शारीर० पञ्चदशकोष्ठाङ्गेष्वेकम्** (चशा. ७.१०) **दशप्राणायतनेष्वेकम्** ( चशा ७.९ ) **विश्रामस्थानम्**

**मूत्रवहानां स्रोतसां मूलम्** ( चवि. ५.८ ) **आशयः, मूत्राधारः, सर्वेषां मूत्ररोगाणामधिष्ठानम्, स चाधोमुखोऽपि मूत्रवहनाडीषु सूक्ष्ममुखसहस्र-निष्यन्देन मूत्राख्येनाविरतं नवो घट इवाप्सु निमग्नमुखोऽपि पार्श्वेभ्योऽम्भसा पूर्यते तैरेव च स्रोतोभिर्वातादयोऽपि दुष्टाः प्रविश्य बस्तिं यथास्वमाधातान् प्रमेहांश्च जनयन्ति** (असंनि. ९.५) **शुक्रवाहिस्रोतोभिः स्यन्नं शुक्रं विलीनं स्वस्थानाद् विच्युतं बस्तौ सम्भृत्य बहिर्निर्याति** (चचि. १५.३५) **बस्तिदेशः, अयं नाभिपृष्ठकटीमुष्कगुदवङ्क्षणशेफसां मध्येऽलाब्वाकृतिः शिरास्नायुपरिग्रहस्तनुत्वको-ऽधोमुख एकद्वारश्च** (सुनि. ३.१८-२०) **रक्तश्लेष्म-प्रसादाद् बस्तिः** (सुशा. ४.२६-२७) **तस्मिन्नभिहते सति वातमूत्रवर्चोनिग्रहवङ्क्षणमेहनबस्तिशूल-कुण्डलोदावर्तादयो भवन्ति** ( चसि. ९.६ )

**मर्म० अल्पमांसशोणितोऽभ्यन्तरतः कट्यां मूत्राशयो बस्तिर्नाम, स्थानत उदरमर्म जातितः स्नायुमर्म, सङ्ख्ययैकं, मानतश्चतुरङ्गुलम्, सद्यःप्राणहरं च, तस्मिन्नश्मरीव्रणादृते विद्धे सद्योमरणम्, अश्मरी-निमित्तेऽप्युभयतो भिन्ने न जीवति, एकतो भिन्ने मूत्रस्रावी व्रणो भवति यत्नेनोपक्रान्तो रोहति च**
( सुशा. ६.६.,२५; असंशा. ७.९ )

मूत्राशय. पंधरा कोष्टांगांपैकी एक. दहा प्राणायतनां-पैकी एक. मूत्रवह स्रोतसांचे मूळ. सर्व मूत्रविकारांचे अधिष्ठान. मूत्राचे आधारस्थान, आशय. ह्याचे तोंड खाली असून त्यात येणाऱ्या मूत्रवह नाडीमध्ये हंजारो सूक्ष्म स्रोतसांतून एकसारख्या पाझरणाऱ्या मूत्ररूप द्रवाने तो भरतो. पाण्यात कोरा घडा खाली तोंड करून बुडवला असता तो बाजूच्या सूक्ष्म छिद्रांनी जसा भरतो तशी ही क्रिया घडते. त्याच सूक्ष्म स्रोतसांनी दुष्ट वातादि दोष सुद्धा बस्तीत प्रवेश करून आपापल्या गुणकर्मांनी बस्तीवर आघात करतात; व प्रमेह निर्माण करतात. स्वस्थानात विलीन असलेले शुक्र तेथून चलित होऊन शुक्रवाही स्रोतसानी स्रवून बस्तीमध्ये भरले जाऊन मूत्रप्रसेक करणाऱ्या स्रोतसाने बाहेर जाते. मूत्राशयाचे शरीरातील स्थान. नाभि ( बेंबी ), पाठ, कंबर, अंड, गुद, आडसंधि, शिश्न या चारी बाजूला असलेल्या अवयवाचे बरोबर मध्यावर ओटीपोटात "मूत्राशय" असतो. त्याचा आकार साधारण भोपळ्याप्रमाणे असतो. शिरा, स्नायु यांनी वेष्टिलेला अत्यंत पातळ त्वचा असणारा, खाली तोंड असणारा हा अवयव आहे. रक्त व कफ धातूच्या प्रसादरूप घटकांनी बस्ती बनला आहे. त्यावर मार लागला तर वायु, मूत्र, पुरीष यांचा अवरोध होतो. आडसंधि, शिश्न, मूत्राशय यांमध्ये दुखावा निर्माण होतो. वातकुंडल, उदावर्त नावाचे विकार होण्याचा संभव आहे.

मूत्राशय हे एक मर्म आहे. ते अल्पशा मांस व रक्ताने घटित कटिप्रदेशाच्या आत आहे. याला मूत्राशय किंवा बस्ति म्हणतात. स्थानाच्या दृष्टीने उदरमर्म व जातीने हे स्नायुमर्म आहे. त्या ठिकाणी मूतखडा काढण्याव्यतिरिक्त इतर कारणांनी व्रण झाला तर तावडतोब मरण येते. मूतखड्याच्या शस्त्रकर्मातही जर दोन ठिकाणी व्रण झाला तरीही मरण येते. पण एकाच बाजूला जर मूत्राशय फाडला तर मूत्रस्राव करणारा व्रण होतो. पण तो योग्य उपायांनी भरून येतो. याचा आकार चार अंगुळे आहे.

**यन्त्र० मूत्राशयपुटकम्** ( चक. चसि. ३.१० ) **मूत्रपुटकम्** ( ड. सुसू. ९.४ ) मूत्रपुटकयंत्र.

**उपक्रम० व्रणस्य षष्ट्युपक्रमेष्वेकः** ( सुचि. १.८ ) **गुदेन भेषजयुक्तजलस्य पक्वाशये उत्क्षेपणं तथा च पक्वाशयस्यान्तःपरिमार्जनम्** ( चवि. ६.१६ ) **वातहराणां श्रेष्ठः, तन्त्राणां श्रेष्ठः** ( चसू. २५.४० ) **यन्त्राणां श्रेष्ठः** ( असंसू. १३.३ )
**वातविकाराणां प्रधानोपक्रमः, अशीतिवातविका-राणां हन्तेत्ययं चिकित्सार्धो मतः, मारुतं पित्त-श्लेष्मविड्सहितं समूलमसौ हन्तीति संपूर्णोऽपि चिकित्सेति कायचिकित्सिते**
( अहसू. १९.८५-८६; असंसू. ३६.४ )

**तन्निरुक्तिः— एणजरद्गवशूकराऽजाऽविगोमहिषादीनां मूत्राधारः तदाधारं कषायाद्यौषधिद्रव्यं च**

( सुचि. ३५.१ ) **बस्तिगुणा :— स्नेहादिसर्वकर्मसु बस्तिकर्म प्रधानतमम्, नानाविधद्रव्यसंयोगाद् दोषाणां संशमनसङ्ग्रहणानि करोति, क्षीणशुक्रं वाजीकरोति, कृशं बृंहयति, स्थूलं कर्शयति, चक्षुः प्रीणयति, वलीपलितमपहन्ति वयः स्थापयति च । अग्निबलवर्णमेधास्वरायुःसुखप्रदः पङ्गुरुणभग्न-**

स्तम्भशूलारोचकपरिकर्तिकादिषु हितः ( सुचि. ३५.३-४; असंसू. २८.४ ) दोषधातूनां एकलोलीभावेऽप्यसौ दोषान् निर्हरति न धातून् ( अरु. अहृसू. १९.८४ ) विधिनास्य सेवनाद् रसायनफलं लभते ( सुचि. ३७.७५ )

बस्तिप्रकाराः– नैरूहिकस्नैहिकभेदाद् द्विविधः ( सुचि. ३५.१८ ) आस्थापनानुवासनोत्तरभेदात् त्रिविधः ( असंसू. २८.५ ) कर्मकालयोगभेदाच्च त्रिप्रकारकः ( अहृसू. १९.६३ ) दोषाणामुत्क्लेशन-शोधनशमनभेदात् कल्पनया त्रिविधो बस्तिः (अहृसू. १९.६१; असंसू. २८.५३) शोधनलेखन-वाजीकरणबृंहणग्राहियापनादिभेदात् तत्तत्कर्मकरा बस्तयः ( चसि. १२.१६; सुचि. ३८.८१-८७ ) पयस्कराश्च ( कासू. १९ )

बस्तियोजना– सत्त्वभेदेनोत्तममध्यमहीनेषु क्रमात्तीक्ष्णमध्यमृदुभेदतस्त्रिधा ( सुचि. ३८.९० ) कालतः– शीते तीक्ष्णः, उष्णे मृदुः, वसन्तशरदोर्मध्यमः, दोषतः– कफवाते तीक्ष्णः, पित्तरक्ते मृदुः, कफपित्ते मध्यमश्च ( सुचि. ३८.९१ )

बस्तियोग्याः– ज्वरातिसारतिमिरप्रतिश्यायशिरोरोगाऽधिमन्थाऽर्दिताऽऽक्षेपकपक्षाघातैकाङ्गरोगसर्वाङ्गरोगाऽऽध्मानोदरशुक्रार्तवस्तन्यनाशहृद्दामयमन्याहनुग्रहमूढगर्भप्रभृतिष्वत्यर्थमुपयुज्यते । तथा वातपित्तकफरक्तेषु संसर्गे सन्निपातेऽपि च हितकरो भवति ( सुचि. ३५.५-६ ) बस्तिनेत्रं तत्साधारणरूपं च–जारद्गवहरिणशूकराजाविगोमहिषादिष्वन्यतमजं स्नेहमुद्गविमृदितं विगतच्छिद्रशिराग्रन्थिस्कन्धं नातिवर्तुलं मृदु दृढं कषायरक्तं सुखसंस्थाप्यौषधप्रमाणं न्युब्जं विवृताननं बस्तिं विवेश्य कर्णिकयोर्दृढेन सूत्रेण घनं समं च बध्वा परिवर्त्य पुनश्चान्यद्बस्तिमुखबन्धनार्थं सूत्रमुपधायानुगुप्तं निधापयेत् ( चसि. ३.१०-११; सुचि. ३५.१३-१७; असंसू. २८.२० ) बाल्यादिमानतस्तन्नेत्रप्रमाणम्–षड्द्वादशविंशतिवर्षजातानां षडष्टद्वादशाङ्गुलसम्मितानि मुद्गसतीनकर्कन्धुवाहिच्छिद्राणि बस्तिनेत्राणि स्युः ( चसि. ३.८; सुचि. ३५.७-९ ) बस्तिप्रदानकालः– अह्नि बस्तिप्रदानं गुणकरम्, तदा दोषाः स्थानस्था भवन्ति । शरीरं च विवृतस्रोतोमुखं भवति । वह्निश्चान्नरसान्वितो भवति, ततो बस्तिद्रव्यं शरीरमनुक्रामति । बस्तिर्निषिद्धो रात्रौ, तदा प्रयुक्ते ज्वराध्मानगौरवादयो भवन्ति ( सुचि. ३७.४७-४८ )बस्तिप्रदानविधिः– तैलाक्तगात्रस्य कृतमूत्र विट्कस्य नातिक्षुधार्तस्य मनुष्यस्य समे ईषन्नतमस्तके वा नात्युच्छ्रिते स्वास्तरणोपपन्ने शयने सव्येन पार्श्वेन स्वभुजोपधानं कृत्वा सुखं शयानस्य वामं सक्थि प्रसार्य दक्षिणं सङ्कोच्य स्निग्धे गुदे स्निग्धं नेत्रचतुर्थभागं प्रणयेत् । दत्तं नेत्रं प्रपीड्य च शनैरेव ततोऽपकर्षेत् ( चसि. ३.१३-१९ ) बस्तिशीलनविधिः– अनुवासनेऽत्यभ्यस्तेऽग्निवधोत्क्लेशौ स्याताम्, निरूहेऽत्यभ्यस्ते वातजा गदा भवेयुःतस्मान्नैकमतिशीलयेत्(ड.सुचि३७.७७-७८) बस्तौ परिहार्याणि–क्रोधो मैथुनं दिवास्वाप उच्चैः सम्भाषणं यानयानं चिरासनमतिचङ्क्रमणं शीतसेवाविरुद्धाध्यशनमसात्म्यभोजनादीनि ( सुचि. ३९.२५-३७ ) बस्तिकल्पः– तत्संयोजनविधिः– अक्षप्रमाणं सैन्धवं प्रसृतद्वयमानं मधु स्नेहं च पात्रे तलेन शनैः शनैर्मथ्नीयात् । सुमथिते मदनफलेन वातादिपूचितानां सर्वद्रव्याणां पलत्रयमानं कल्कं दद्यात् । अनन्तरमन्यस्मिन् गम्भीरे भाजने तत् सर्वमपि खजेन मथ्नीयात् । तत्र पञ्चप्रसृतमानं कषायं दापयेत् । दोषावस्थामवेक्ष्य रसक्षीराम्लमूत्राणामुपयोगः कार्यः, कल्पोऽसौ न तनुर्न सान्द्रश्च विधेयः । सम्यक् सिद्धोऽयं कल्पो मूत्रं पटुत्वं कुरुते, वीर्यं चोद्भावयति स्रोतोभ्यः कफमारुतौ विष्यन्दयति पित्तं हरति च । असम्यङ्मथितो बस्तिर्नार्थाय कल्पते (सुचि.३८.३३-३६ काखिल.८.४०-४६)वातादिदोषतो बस्तिसङ्ख्या–कफजे विकारे एकं त्रीन् वा, पित्तात्मके पञ्च सप्त वा, वाते नवैकादश वा अयुग्मान् बस्तीन् दद्यात् ( चसि. १.२५ ) बस्तिप्रशस्तिः–ये स्तब्धाः सङ्कुचिताः पङ्गवो भग्नरुग्णा येषां शाखासु वाताश्चरन्ति तत्र तथाऽऽध्मापने विग्रथिते पुरीषे शूले भक्तानभिनन्दने च बस्तिः प्रशस्तः, या वातकृतोपसर्गाः स्त्रियो गर्भं न गृह्णन्ति तासु, क्षीणेन्द्रियेषु कृशेषु नरेषु च बस्तिरेव परमं प्रशस्तः, किंचासौ कायचिकित्सिते संपूर्णा चिकित्सेत्युच्यते ( चसि. १.३२-३४ )

बस्ती म्हणजे गुदमार्गाने औषधांनी संस्कारित स्नेह, स्नेहयुक्त काढा एका नळीने गुदात घालणे. ते सामान्यपणे पक्वाशयाच्या बऱ्याचशा भागात जाऊन

तेथील साठलेल्या मळाला, दोषांना, शरिराबाहेर गुदमार्गानेच काढील एवढा वेळ ते पाणी ( काढा ) तेथे राहील अशा काळजीने दिलेला एक उपचार. याला बस्तिचिकित्सा म्हणतात. पक्वाशय आतून स्वच्छ करण्याचे कार्य यामुळे घडते. वातविकारावरील ही एकमेव श्रेष्ठ चिकित्सा आहे असे म्हटले जाते व त्या कामी बस्तीयंत्र हे श्रेष्ठ यंत्र होय. ऐशी वातविकार नष्ट करीत असल्याने बस्तीची चिकित्सा ही संपूर्ण वैद्यकचिकित्सेचे अर्धे अंग मानले आहे. याचे कारण पित्त, कफ यांच्यासह मुळापासून पुरीषमलाला नाहीसा करण्याचे कार्य यामुळे घडते. **बस्तिचिकित्सेचे गुण**–स्नेहादि सर्व कर्मामध्ये बस्तिकर्म मुख्य आहे. अनेक तऱ्हेच्या द्रव्यांच्या योगाने बिघडलेल्या दोषांना आळा बसून त्यांचे प्रशमन होते. शुक्र क्षीण झाले असेल तर बस्तिचिकित्सेने ते प्रमाणात वाढविता येते. कृशांना पुष्ट करते. लठ्ठांचाही लठ्ठपणा घालवून कृश करते. डोळे पाणीदार होतात; अंगावरील सुरकुत्या, वळ्या नाहीशा होतात. केस पिकत नाहीत; तारुण्य टिकते; तसेच अग्नि, बल, वर्ण, धारणाशक्ति, स्वर, आयुष्य यांना सुख देणारे, पांगळे, हाडे इ० मोडलेले, अवयव जखडलेले, शूल, अरुची, गुदमार्गात कातरल्यासारखी पीडा असणारे इत्यादी विकारांनी पीडित रोग्यांना हितकारक. दोष धातु जरी संमिश्र स्थितीत असले तरी शरिरातील बिघडलेल्या दोषांनाच फक्त नष्ट करते; धातूचा नाश करीत नाही. विधिपूर्वक याच्या सेवनाने रसायन सेवनाचे लाभ होतात. **बस्तीचे प्रकार**–निरुह आणि आणि स्नेह बस्ति असे मुख्य दोन प्रकार आहेत. आस्थापन, अनुवासन व उत्तर बस्ति असेही तीन प्रकार आहेत. गुणाने रुक्ष द्रव्यांचा बस्ति–निरुह किंवा आस्थापन आणि स्निग्ध द्रव्यांचा बस्ति तो अनुवासन किंवा स्नेह असे भेद आहेत. शिवाय कर्म, काल, योग अशा भेदानेही बस्तीचे ३ प्रकार सांगितले आहेत. दोषांचा उत्क्लेश, दोषांचे शोधन आणि दोषांचे शमन या कल्पनांनीही बस्तीचे ३ प्रकार संभवतात. शोधन, लेखन, वाजीकरण, बृंहण, ग्राहि, यापन अशा कर्मानुसार बस्तींची योजना करता येते. शिवाय प्रसूत स्त्रियांना दूध अधिक यावे म्हणूनहि याचा उपयोग होतो. बस्तीची योजना करताना व्यक्तीच्या सहनशक्तीच्या पात्रतेप्रमाणे उत्तम, मध्यम, कनिष्ठ असे भेद केलेले आहेत. तशीच तीक्ष्ण, मध्यम, मृदु अशीही त्यांची योजना आहे. कालाचे दृष्टीने शीतकालात तीक्ष्ण, उष्णकालात मृदु, वसंत आणि शरदामध्ये मध्यम. दोषाप्रमाणे कफवातात तीक्ष्ण, पित्तरक्तात मृदु, कफपित्तात मध्यम योजना करावी लागते. **बस्ति द्यावयास योग्य असे विकार**—ज्वर, अतिसार, तिमिर, नेत्ररोग, पडसे, शिरोरोग, अधिमंथ, अर्दित, आक्षेपक, पक्षाघात, एकांगरोग, सर्वांगरोग, आध्मान, उदर, शुक्रदोष, आर्तवविकार, स्तन्यनाश, हृदयविकार, मन्याग्रह, हनुग्रह, मूढगर्भ इत्यादी. त्याप्रमाणेच वात, पित्त, कफ, रक्त, संसर्ग आणि सन्निपात यामध्येही हितकारक आहे.

**बस्तीचे स्वरूप**—वृद्ध गाय किंवा बैल, हरीण, डुक्कर, मेंढा, बकरा, रेडा, इत्यादी पैकी कोणातरी एकाचा मूत्राशय अवयव घेऊन स्नेह द्रव्याने खूप मर्दन करून तो बस्ति कोठेही फाटला नाही, त्यावर शिरांचे जाळे, गांठी, छिद्र इ० नाहीत असे पाहून अंडाकार असा तो मऊ व चिवट बनवून त्याला हिरडा खैर, इ० द्रव्यांचा काढा करून त्याने रंगवावा. पुरेसे औषधाचे प्रमाण त्यात राहील अशा बेताचा आणि तोंडाचा करावा. नंतर त्याला पालथा करून रुंद तोंडाच्या भागांत काठकंगोरे असलेली नळी पक्क्या दोऱ्याने बांधावी. व मग तो बस्ती उलटा करून पुन्हा ते तोंड दुसऱ्या एका दोऱ्याने घट्ट बांधून नीट संभाळून ठेवावा.

**नळीचे प्रमाण**—सहा, बारा, वीस वर्षांचे माणसांसाठी क्रमाने सहा आठ आणि बारा अंगुळे लांबीची नळी उपयोगात आणावी. त्याप्रमाणे मूग, वाटोळा वाटाणा, बोराची बी जाऊ शकेल अशी क्रमशः त्या नळ्यांना आरपार छिद्रे असावी.

**देण्याचा काल**—दिवसा बस्ती द्यावा तो गुणावह होतो. त्या वेळी दोष स्वस्थानी असतात. शरिराची स्रोतसेही खुली असतात. अग्निसुद्धा अन्नरसयुक्त असतो, त्यामुळे बस्तीचे द्रव्य सर्व शरिरभर पसरू शकते. रात्री बस्ती देऊ नये. त्या वेळी दिला तर ज्वर, पोट फुगणे, जडत्व इत्यादी त्रास होईल. **बस्ति देण्याची पद्धति**–फार भूक न लागलेल्या मनुष्याचे

शरीर तेलाने स्निग्ध करून मल व मूत्र विसर्जन करून एकसारख्या ( उंच सखल नसलेल्या ) अंथरुणावर त्याला झोपवावा. झोपताना उजव्या कुशीवर वळून झोपावे. हात उशाखाली घ्यावे. ( किंवा हाताचीच उशी करावी ) डावा पाय लांब करावा व उजवा पाय आखडून पोटाजवळ घ्यावा. नंतर गुदभाग तेलाने स्निग्ध करून व नळीलाही तेल लावून तिचा ( बस्तिनेत्राचा ) एक चतुर्थांश भाग गुदमार्गात घालावा आणि नळी पकडून हळूच काढून घ्यावी. बस्तिपिधान युक्तीने करावे.

**बस्तिशीलनविधि**—अनुवासन जर फार दिले तर अग्निमांद्य व उत्क्लेश होण्याची भीति आहे. निरूह फार दिले तर वातरोग फार होण्याची भीति आहे म्हणून कोणताही एक तऱ्हेचा बस्ति अति देऊ नये.

**बस्तिविधि चालू असताना पाळावयाचे पथ्य**—क्रोध, मैथुन, दिवसा झोप, मोठ्याने बोलणे, वाहनातून प्रवास, बराच वेळ बसून रहाणे, फार फिरणे, थंड पदार्थांचे सेवन, विरुद्ध आहाराचे भोजन, जेवल्यावर लगेच पुन्हा भोजन, सवयीचे नसलेले भोजन इत्यादी वर्ज्य करावे.

**बस्तिविधि**—एक तोळा सैंधव, १६ तोळे मध व तितकाच स्नेह एका पात्रात घेऊन हळुहळु घुसळावे. नंतर गेळफळ वाटून त्याचा गोळा मिश्र करावा. पुन नीट मिसळावे. दोषांना अनुसरून सर्व द्रव्यांचा चटणीसारखा गोळा १२ तोळे त्यांत मिश्र करावा. नंतर ते सर्व मिश्रण दुसऱ्या एका खोल भांड्यात घालून रवीने घुसळावे. त्यात ४० तोळे काढा घालावा. शिवाय दोषांच्या अवस्था पाहून मांसरस, दूध, अम्ल द्रव्य, मूत्र यांचा उपयोग करावा. हा द्रव पातळ किंवा घट्ट असू नये. हा द्रव चांगला तयार झाला तर मलमूत्र-प्रवृत्ति चांगली होते, त्या औषधाचे वीर्य सर्व शरीरभर पसरते व स्रोतसातून कफ आणि वायूचा स्राव बाहेर (बस्तीच्या बाहेर जाणाऱ्या द्रव्याबरोबर) होतो आणि पित्ताचे हरण होते. जर त्या द्रवाचे मंथन नीट झाले नाही तर इष्ट कार्य नीट होत नाही.

**दोषांना अनुसरून बस्तींची संख्या**—कफज विकारात एक किंवा तीन, पित्तज विकारात पाच किंवा सात आणि वातविकारात नऊ किंवा अकरा अशा विषम संख्येने द्यावे.

**बस्तीची प्रशस्ती**—ज्यांचे अवयव ताठलेले किंवा आखडलेले आहेत, जे पांगळे आहेत, ज्यांची हाडे फुटली किंवा संधी निखळले आहेत, ज्यांच्या हातपाय ह्या शाखांमध्ये प्राण, अपान, व्यान, समान ह्या प्रकुपित वायूंचा संचार होत आहे तसेच वायूने पोट फुगणे, मळाच्या गाठी होणे, शूळ होणे, अन्नाची इच्छा नसणे हे विकार असताना, वाताच्या उपसर्गाने ज्या स्त्रियांना गर्भ राहात नाही, ज्यांची इंद्रिये क्षीण आहेत, जे कृश आहेत, अशांना बस्ती हाच अत्यंत श्रेष्ठ उपचार आहे. कायचिकित्सेमध्ये म्हणूनच बस्तीचिकित्सा ही संपूर्ण चिकित्सा आहे असे म्हटले आहे.

**-कर्मन्**—न., **मूत्राधारपुटकेन क्रियमाणा चिकित्सा** ( सुचि. ३५.३ )

मूत्राधारपुटाच्या ( बस्तीच्या ) सहाय्याने केलेली चिकित्सा, बस्तीच्या सहाय्याने केलेले उपचार.

**-कर्मविभ्रम**—पु., **बस्तिकर्मणि प्रमादः, अनेनार्शः समुत्पद्यते** ( चचि. १४.९ )

बस्तिकर्म करताना झालेली चूक, याने मूळव्याध होते.

**-कुण्डल**—न., रोग० **त्रयोदशबस्तिविकारेष्वेकः, द्रुताध्वलङ्घनादिभिः स्वस्थानादुद्वृत्तो बस्तिः स्थूलो गर्भवच्च तिष्ठति, तत्र शूलस्पन्दनदाहाश्च भवन्ति, बस्तिर्बिन्दुं बिन्दुं स्रवति, पीडितस्तु संस्तम्भोद्वेष्टनार्तियुक्तः सन् धारां सृजेत्, अयं शस्त्रविषोपमो घोरो व्याधिः, तत्र पित्तान्विते बस्तिकुण्डले दाहः शूलं मूत्रविवर्णता च भवति। तथा श्लेष्मान्विते गौरवं शोफो मूत्रं घनं सितं स्निग्धं च भवति** ( चसि. ९.४४-४७ )

बस्तिकुंडल नावाचा मूत्राशयासंबंधी तेरा विकारांपैकी एक. अति लवकर चालणे, लंघन, इत्यादींनी बस्ति स्वतःच्या स्थानाच्या वर जाड व गर्भाप्रमाणे रहातो. त्यात शूल, स्फुरण, दाह हे उपद्रव होतात. बस्तिमधून थेंब थेंब मूत्र स्रवते. तो दावला तर अडखळत वेदना-युक्त धार पडते व ढुंगणाच्या भागात दुखते, हा शस्त्र व विषासारखा भयंकर रोग असतो. पित्ताची जोड याला असली तर शूल दाह व लघ्वीचा रंग वाईट होतो. कफाने जडत्व सूज मूत्र दाट पांढरे व स्निग्ध होते.

**-जविद्रधि**-स्त्री., बस्तिप्रदेशे जातायां विद्रधौ कृच्छ्रपूतिमूत्रवर्चस्त्वं भवति ( चसू. १७. १०१ )
मूत्राशयाला झालेला विद्रधी, यात मूत्र व मळ कष्टाने व घाण होतात.

**-दान**-न., बस्तिप्रदानम् ( चसि. ३.२४ ) बस्ती देणे.

**-दारण**-न., मूत्राशयस्फुटनम्, बस्तिदारणवद्वेदना ( सुनि. ३.८ )
मूत्राशय फुटणे, फुटल्यासारखी वेदना होणे.

**-दूषण**-वि., बस्तिं दूषयति इति बस्तिदूषणं नाम मूत्राशये वातादिप्रकोपकारि ( सुसू. ४५.१६९ )
मूत्राशयाला वातादिदोषांना बिघडविणारे.

**-दोष**-पु., बस्तियन्त्रस्य आशयदोषः स पञ्चधा— बहलताऽल्पता सच्छिद्रता प्रस्तीर्णता दुर्बद्धतेति ( सुचि. ३५.३२ ) मांसलस्निग्धविषमजालवत्स्थूलवातलच्छिन्नक्लिन्नाश्चेत्यष्टौ दोषाः, तेभ्योगतिवैषम्यदौर्गन्ध्यजिह्मत्वस्रुतिदुर्ग्रहफेनिलव्युस्रधार्यत्वानि भवन्ति ( चसि. ५.६-७; असंक. ७ )

**बस्तियंत्राचे ५ दोष**-जाड किंवा लहान असणे, छिद्रे असणे, त्यावर स्नायूचे जाळे असणे, तो नीट बांधता न येणे.

**चरक मताने ८ दोष**-जाड, स्निग्ध, वेडावाकडा, जाळ्यानी युक्त, आकाराने मोठा, आतील द्रव्यात बुडबुडे होणारा, चरे पडलेला आणि ओला.

ह्या **दोषांचे परिणाम**-दुर्गंध, गतिवैषम्य ( आतील द्रव्य सरळ बाहेर न पडणे ), वेडेवाकडेपणा, द्रव्य गळणे, धरता न येणे, द्रव्यात फेस येणे, हातातून निसटणे, ओलेपणामुळे सांभाळता न येणे.

**-द्रव्यदोष**-पु., बस्तिद्रव्यगतदोषः, स चैकादशधा- आमता हीनताऽतिमात्रताऽतिशीतताऽत्युष्णताऽतितीक्ष्णताऽतिमृदुताऽतिस्निग्धताऽतिरूक्षताऽतिसान्द्रताऽतिद्रवता चेति (सुचि. ३५.३२)
बस्तीसाठी वापरलेल्या औषधिद्रव्यांतील दोष. कच्चेपणा, प्रमाणापेक्षा कमी किंवा अति असणे, अति थंड, अति उष्ण, अति तीक्ष्ण, अति मृदु, अतिस्निग्ध, अतिरूक्ष, अति दाट, अति पातळ.

**-द्वार**-न., बस्तिसमीपम् ( अहृशा. २.५३ )
मूत्राशयाजवळचा भाग, मूत्राशयद्वाराजवळचा भाग.
**मूत्राशयद्वारम्** ( सुशा. ४.२२ ) मूत्राशयद्वार.

**-निबन्धन**-वि., बस्तिनिबन्धनप्रयोजनकम् ( चक्र. चसि-३.१० )
बस्ति बांधणे हेच प्रयोजन ज्याचे ते.

**-निस्तोद**-पु., रोगलक्षण० बस्तिप्रदेशे व्यथा ( अहृसू. ११.१३ ) मूत्राशयामध्ये दुखावा.

**-नेत्र**-न., बस्तिनलिका ( सुचि. ३५.१२ )
बस्तीची नळी.

**-नेत्रदोष**-पु., बस्तिनलिकागतदोषः, सोऽष्टधा- ह्रस्व-दीर्घ-तनु-स्थूल-जीर्ण-शिथिलबन्धन-पार्श्वच्छिद्रवक्रभेदात्, तेभ्यःक्रमात् स्नेहस्याप्राप्तिरतिप्राप्तिः क्षोभश्च कर्षणं क्षणनं स्रवो गुदपीडा स्नेहस्य जिह्मा गतिश्चेत्यष्टौ व्यापदो भवन्ति (चसि. ५.४;असंक. ७) सुश्रुते एकादश नेत्रदोषाः- अतिस्थूलं कर्कशमवनतमणुभिन्नं सन्निकृष्टकर्णिकं विप्रकृष्टकर्णिकं सूक्ष्मच्छिद्रमतिच्छिद्रमतिदीर्घमतिह्रस्वमस्रिमच्चेति ( सुचि. ३५.३२ )
बस्ति-नळीचे दोष आठ प्रकारचे आहेत. (१) आखूड (२) लांब (३) पातळ (४) जाड (५) जुनेपणा (६) बंधन शिथिल असणारे (७) बाजूला भोक असणे व (८) नळी वाकडी असणे. याने क्रमशः (१) स्नेह न पोचणे (२) अधिक पोचणे (३) गुदाची अंतस्त्वचा हुळहुळी होणे (४) गुदवली ताणली जाणे (५) जखम होणे (६) स्राव होणे (७) गुदपीडा होणे (८) स्नेहाची वाकडी गति ह्या आठ आपत्ति येतात.
सुश्रुताचार्यांनी नळीचे ११ दोष सांगितले आहेत— (१) अतिजाड (२) खरखरीत (३) खाली वाकलेली (४) कुठेतरी फुटून तुकडा पडणे (५) कर्णिका जवळ असणे (६) कर्णिका फार दूर असणे (७) छिद्र बारीक असणे (८) छिद्र फार मोठे किंवा अधिक असणे (९) नळी फार लांब असणे (१०) नळी अति आखूड असणे (११) कोपरा किंवा धार असणे.

**-पाक**-पु., रोग० बस्तेः कोथनम् पूतिभावापन्नत्वम् ( चसि १२.१८-१४ )
मूत्राशयातील कूज. बस्ती पिकणे.

**-पीडनदोष**-पु., बस्तिप्रपीडने दोषः, स चतुर्धा- अतिपीडनं शिथिलपीडनं भूयो भूयोऽवपीडनं कालातिक्रमश्चेति ( सुचि. ३५.३२ )
बस्तियंत्राला बस्ती देताना योग्य तऱ्हेने दाब न दिल्यामुळे होणारे दोष; हे चार. जोराने दाबणे, ढिले दाबणे, पुनः पुन्हा दाबणे योग्य काळानंतर दाबणे.

**-पीडनयोग्या**-स्त्री., **बस्तिबन्धनस्य योग्या, अभ्यासः बस्तिबन्धनाभ्यासः** ( असंसू. २४.३८ )
बस्तियंत्र वापरण्याचा अभ्यास.

**-पूरण**-न., **मूत्राशयपूरणम्** ( सुसू. १५.५ ( २ )
मूत्राशय भरणे.

**-प्रणिधानदोष**-पु., **बस्तिप्रदानकर्मणि दोषः, स षड्विधः-विचलितं विवर्तितं पार्श्वावपीडितमत्युत्क्षिप्तमवसन्नं तिर्यक्क्षिप्तमिति** ( सुचि. ३५.३२ )
बस्ती देताना निर्माण होणारे दोष; हे सहा आहेत. हात कापीत ( कंपयुक्त ) बस्ती देणे, आत सरळ घातल्यानंतर वेडावाकडा करणे, बाजूला दाबणे, अधिक आत घालून दाबणे, योग्य प्रमाणात आत न घालता दाबणे आणि तिरकस घालणे.

**-प्रवर्तित**-वि., **बस्तिना प्रवृत्त्युन्मुखीकृतो दोषः** ( चक्र. चक. १२.८० )
बस्तीने बाहेर जाण्यास प्रवृत्त झालेला दोष.

**-भेद**-पु., लक्षण० **बस्तेर्भिन्नत्वम्, बस्तौ एकपार्श्वतो भिन्ने मूत्रस्रावी व्रणो भवति, उभयतो भिन्ने नरो न जीवति** ( सुशा. ६.२५ )
मूत्राशय फुटणे, भेगा पडणे, जखम होणे. बस्ती एका बाजूला फुटला तर मूत्रस्रावी व्रण होतो. दोन्ही बाजूला फुटला तर मनुष्य जगत नाही.

**-मुख**-न., **मूत्राशयद्वारम्** ( सुनि. ३.८ )
मूत्राशयाचे द्वार.

**-रोधन**-पु., वनस्पति० **मदनः** ( रा. ८.२३१ )
गेळफळ.

**-विधि**-पु., **अध्यायसंज्ञा०** ( असंसू. २८.१ )
बस्तिविधी, अध्यायाचे नाव.

**-वीर्य**-न., **बस्तिप्रभावः** ( सुचि. ३५.२५ )
बस्तीची कार्यकारी शक्ती.

**-व्यापद्**-स्त्री., **बस्तिप्रदानादिभिर्मिथ्याप्रयुक्तैर्जनितो व्याधिः, व्यापदः सङ्ख्या षट्सप्ततिः, तत्र प्रणिधानदोषाः षट्, नेत्रदोषा एकादश, बस्तिदोषाः पञ्च, पीडनदोषाश्चत्वारः, द्रव्यदोषा एकादश, शय्यादोषाः सप्त, आतुरनिमित्ताः पञ्चदश, वैद्यनिमित्ता नव, ते चायोगाध्मानपरिकर्तिकापरिस्रावप्रवाहिकाहृदयोपसरणाङ्गप्रग्रहातियोगजीवादानभेदात; स्नेहदोषाश्चाष्टौ** ( सुचि. ३५.३३ )
बस्ति क्रियेमधील निर्माण होणारे दोष. ७६ प्रकारांनी यांचे दोष होतात. बस्ति प्रणिधान म्हणजे तो देण्यातील दोष ६; बस्तीच्या नळीचे दोष ११; बस्तियंत्रदोष ५; बस्ती देताना दाबण्यातील दोष ४; औषधांचे दोष ११; बस्ती देताना आंथरलेल्या शय्येचे दोष ७; रोग्याकडून घडणारे १५; वैद्यामुळे संभवनीय दोष ९; स्नेहांतील दोष ८.

**-व्यापत्सिद्धि**-स्त्री., **अध्याय०** ( चसि. ७ )
अध्यायाचे नाव. अयोग्य प्रकारे बस्ती देण्याने उत्पन्न होणाऱ्या उपद्रवांबद्दल माहिती यात आहे.

**-शय्या**-स्त्री., **बस्त्यर्थं शय्या** ( असंक. ७ )
बस्ती देण्याच्या वेळचे अंथरूण.

**-शय्यादोष**-पु., **बस्तिशय्यास्थितपुरुषदोषाः, स सप्तधा, अवाक्शीर्षशयनं, उच्छीर्षशयनं, न्युब्जशयनं, उत्तानशयनं, संकुचितदेहशयनं, स्थितं, दक्षिणपार्श्वशयनं चेति, तेभ्यः क्रमान्मूत्राघातोऽन्त्रसम्प्राप्तिरप्राप्तिः साधुतागतिराश्वागतिर्मरुत्कोपः पक्वाशयतृप्तिश्चेति व्यापदो भवन्ति** (सुचि. ३५.३२; असंक. ७ )
बस्तिशय्येमधील दोष-हे सात, ( १ ) वर डोके ( २ ) खाली डोके ( ३ ) खाली तोंड ( ४ ) हात पाय संकुचित ( ५ ) बसणे ( ६ ) उताणी स्थिति व ( ७ ) उजव्या कुशीवर आडवे रहाणे. बस्ति घेताना शरीर ह्या ७ प्रकारांपैकी कसेही असणे दोषास्पद होय. अनिष्ट परिणाम-( १ ) लघ्वीला त्रास ( २ ) आंतड्यात जाणे ( ३ ) पक्वाधानात न जाणे ( ४ ) बाहेर येणे, ( ५ ) लगेच बाहेर येणे ( ६ ) वाताचा प्रकोप ( ७ ) पक्वाशयतृप्ति.

**-शिरस्**-न., **षट्पञ्चाशत्प्रत्यङ्गेष्वेकम्, नाभेरधो बस्तेः शिरः, मूत्राशयोपरितनो भागः**(ड.सुनि.३.५) **मानतस्तद्दशाङ्गुलम्** (चवि. ८.११७; असंशा.८.३०) **सङ्ख्ययैकम्** ( चशा. ७.११ )
बस्तिशिर. छप्पन्न प्रत्यगांपैकी एक प्रत्यंग. नाभीच्या खाली मूत्राशयाचा वरचा भाग. प्रमाणाने दहा अंगुळे, संख्या एक.

**-शीर्ष**-न., **बस्तिशिरः** ( चशा. ७.११ ) बस्तिशिर.

**-शुद्धिकर**-वि., **मूत्राशयशोधनद्रव्यम्** ( हे ) **कूष्माण्डादि** ( अरु. अहसू. ४.२१ )
मूत्राशयशोधनद्रव्य कोहळा इ०

**-शूल**-पु., रोग० **तल्लक्षणम्-मूत्रपुरीषादिसंरोधात् कुपितो वायुर्बस्तिमावृत्य तिष्ठति, ततो बस्तिवङ्क्षणनाभीषु शूलो विण्मूत्रवातानां संरोधश्च भवति** ( सुउ. ४२.१३३-१३४ )

बस्तिशूल नावाचा रोग. मळमूत्रादिकांच्या अवरोधाने प्रकुपित वायु बस्ति व्यापून-आवरण करतो. तेव्हा ओटीपोटात, मांडीच्या जांघेत, नाभीत शूल, मळमूत्रवातांचा अवरोध होतो.

न., लक्षण० **बस्तौ शूलवद्वेदना** ( चसू. ७.६; अहृसू. ५.७९ )

बस्तिमध्ये शूल टोचल्यासारखी पीडा.

**–शोथ**–पु., लक्षण० **मूत्रधारशोथः** ( चचि. २६.७ ) मूत्राशय शोथ–सूज.

**–शोधन**–वि., **मूत्रविरेककारि** ( सुसू. ४६.५४; अहृसू. ५.१६ ) मूत्राचे विरेचन करणारे.

**–सिद्धि**–स्त्री., **अध्यायसंज्ञा०** ( चसि. १०.१ ) अध्यायाचे नाव. बस्तिविधीची काही माहिती यात आहे.

**–सूत्रीयासिद्धि**–स्त्री., **अध्यायसंज्ञा०** (चसि. ३.१) अध्यायाचे नाव. बस्तिविधीची पुष्कळ माहिती यात आहे.

**–स्नेहदोष**–पु., **बस्तिस्नेहगतदोषः, सोऽष्टधा–अतिमृदुरतिहिमोऽतितक्षाम्लतीक्ष्णोऽतिस्निग्धोऽतिरूक्षोऽल्पमात्रालवणोऽतिमात्रालवणः सान्द्रश्च** ( अहृसू. १९.४१-४२ )

बस्तीकरिता वापरले जाणारे स्नेहामधील दोष आठ प्रकारचे. बस्तीतील स्नेहात मृदु, थंड, तापणे, आंबट, तीक्ष्ण, स्निग्ध, रूक्ष हे गुण अतिप्रमाणात असणे, मीठ अति असणे किंवा मुळीच नसणे, प्रमाण थोडे किंवा फार असणे, हे बस्तीतील स्नेहाचे दोष आहेत.

**बहल**–पु., **वनस्पति० शिग्रुः** ( अहृसू. १५.४५; ( असंसू. १६.१५ ) शेवगा.

वि., **स्थूलम्, घनम्** (सुउ. १५.१८; सुसू. १४.२१) जाड. लठ्ठ.

**–गन्धकृत्**–पु., **धान्य० व्रीहिः** ( रा. १६.१२० ) तांदूळ.

**–ता**–स्त्री., **विस्तीर्णता** ( असंशा. ५.५२ ) विस्तीर्णता, पसरट असणे.

**–त्वच**–पु., **वनस्पति० लोध्रभेदः, शाबररोध्रः** ( रा. ६.२४१ )

लोध्राचा भेद, शाबर नावाचे लोध्र.

**–पल्लव**–पु., **वनस्पति० शिग्रुः** ( असंसू. १६.१५ ) शेवगा.

**–वर्त्मन्**–न., **नेत्रवर्त्मगतो व्याधिः, सर्वजोऽयम्** ( सुउ. १.४२ ) **तल्लक्षणम्–यस्य वर्त्म सवर्णाभिः समाभिः पिडकाभिः समन्तत उपचीयते, स बहलवर्त्माख्यः** ( सुउ. ३.१६ ) **अयं लेख्यः साध्यश्च** ( सुउ. १३.१४; असंउ. ११ )

नेत्राच्या पापणीचा हा विकार सर्वदोषज आहे. **लक्षण**—पापणीत सर्वत्र तिच्या रंगाच्या सारख्या आकाराच्या पुळ्या होतात. हा बहलवर्त्म नावाचा रोग शस्त्राने खरडून काढल्यास साध्य होतो.

**बहिस्**–(अव्य.) **बाह्यम्, बहिर्भागे** ( चचि. ३.७६ ) बाहेरचा भाग.

**–ताप**–पु., लक्षण० **बाह्यतो दाहः** ( चचि. ३.७६ ) बाहेरून होणारा दाह.

**–तुङ्ग**–वि., **बाह्यत उन्नतम्** ( चचि. ५.४२ ) बाहेरून उंच.

**( बहिः )–परिमार्जन**–न., **उपक्रम० बहिःस्पर्शमाश्रित्याभ्यङ्गादिभिर्व्याधीनां दूरीकरणम्** (चसू. ११.५५) बाहेरून तेल लावून अंग चोळून साफ करून रोग दूर करणे.

वि., **बाह्यतः शुद्धिकरं ( भेषजम् )** ( असंसू. ३९.४ ) बाहेरून शुद्ध करणारे.

**–शीत**–वि., **बाह्यस्पर्शे शीतम्** ( सुसू. ४२.१०(२) ) बाहेरून स्पर्शाला थंड असणारे.

**–श्रित**–वि., **बहिर्मार्गे शाखायामाश्रितम्** ( चचि. २१.२३ )

बाह्यरोगमार्गाच्या आश्रयाने होणारे ( हातापायांना झालेले ).

**( बहिर् )–जानु**–अव्य., **जान्वोः बहिः** ( असंसू. ३.११ ) गुडघ्याच्या बाहेर.

**–निष्क्रमण**–न., **अटनम्** (सुशा. १०-३) बाहेर काढणे.

**–मुख**–वि., **बहिर्निःसरणाभिमुखम्** ( चशा. ६.१७ ) बाहेर जाण्याच्या मार्गास असलेले, बाहेर जाण्यास प्रवृत्त झालेले.

**–वेगज्वर**–पु., **ज्वरभेदः, यस्मिन् ज्वरकृद्दोषो विशेषतो बाह्यतो लक्षणानि दर्शयति, तल्लक्षणम्–बाह्योऽभ्यधिकः सन्तापस्तृष्णादीनां च मार्दवं सुखसाध्यत्वं च** ( चचि. ३.४१ )

ज्वराचा प्रकार. शरिराच्या बाहेरच्या भागात ज्या तापाचा त्रास होतो तो. यात शरिराची बाहेरून आग

फार होते पण तहान इत्यादी आतली चिन्हे सौम्य असतात. ज्वर हा सुखसाध्य असतो.

**बहिरन्त्रग**–वि., **अन्त्राद्बाह्यगम्** ( चक्र. चचि. १३.३० ) आतड्यातून बाहेर गेलेले. आंत्राच्या बाहेर असलेले.

**बहिरायाम**–पु., **रोग० वातरोगः आयामभेदः तल्लक्षणम्–बली वायुः पृष्ठमन्याश्रिता बाह्याः स्नायुकण्डराः सिराः संशोष्य बहिरायामसंज्ञकं हनुस्तम्भं कुर्यात्। चापवन्नाम्यमानस्य शिरः पृष्ठतो नीयते, उर उत्क्षिप्यते, मन्या स्तब्धा भवति, ग्रीवाऽवमृद्यते, दन्तानां दशनं जृम्भा लालास्रावो वाग्ग्रहश्च भवति, जातवेगोऽसौ आतुरं निहन्ति वैकल्यं वा प्रयच्छति** ( चचि. २८.४५; असंनि. १५.२७-२८ ) **असाध्यलक्षणम्–यस्य प्रतिबुद्धस्य हनूमन्ये तथाऽक्षिणी स्तभ्येते, अरिष्ट-लक्षणलक्षितत्वेन सोऽसाध्यः** ( चइ. ५.२४ ) बहिरायाम हे एका वातरोगाचे नाव. प्रकुपित झालेला वायु मान आणि पाठ यांच्या बाहेरून असणाऱ्या स्नायु-कंडरा व शिरांना शुष्क करून बहिरायाम नावाचा रोग करतो. त्या भागाला बाहेरच्या बाजूने ताणून–वाकवून आचके करतो. हनुवटी जखडते. धनुष्य ओढल्याप्रमाणे डोके पाठी-मागे नेले जाते, उराचा भाग पुढे येतो, मान ताठते, मान चुरली जाते, दात चावतो, जांभई, लाळ गळणे, वाणी अडखळणे होते. ह्याचा वेग रोग्याला मारतो किंवा व्यंग उत्पन्न करतो. जागा झाल्यावर डोळे, हनुवटी, मान ज्याचे अगदी ताठ दिसतील त्याचा तो रोग असाध्य समजावा.

**बहिरायामिन्**–वि., **बहिरायामार्तः पश्चान्मुखगामी** ( ड. सुचि. ५.१८ ) द्र० ' **बहिरायाम** ' बहिरायाम रोगाने पीडलेला. मागे तोंड नेणारा.

**( बहिश् )–चर**–वि., **बहिः सञ्चरणशीलः बहिर्नाम शरीरगतरोमकूपेषु सञ्चरन्नग्निरान्तरः** ( ड. सुउ. ३९.२३ ) शरिराच्या बाहेरील भागावर संचार करणारा (अग्नि). शरिराच्या रोमरंध्राकडे संचार करणारा अंतराग्नि (ज्वरकर).

**बहु**–वि., **अधिकम्, बाहुल्यविशिष्टम्** ( चवि. ८.९८ ) पुष्कळ.

**( बह्वी )**–स्त्री., **वनस्पति० गण्डदूर्वा** ( ध. ४.१४५ ) दूर्वांचा प्रकार ( गाठाळ ) गण्डदूर्वा.

**–कण्ट**–पु., **वनस्पति० बदरभेदः, सूक्ष्मफलः** ( रा. ११.१६४ ) बोराची एक जात; बारीक बोर.

**( –कण्टा )**–स्त्री., **वनस्पति० कण्टकारी** (रा. ४.७१) काटेरिंगणी.

**–कण्टक**–पु., **वनस्पति० गोक्षुरभेदः, क्षुद्रगोक्षुरः** ( रा.३.१३१ ) द्र० '**गोक्षुर**' लहान गोखरू.
**वनस्पति० हिन्तालः** ( रा. ९.९७ ) शिंदी.
**धन्वयासः** ( रा. ३.२५ ) धमासा.

**(–कण्टका)**–स्त्री., **वनस्पति० अग्निदमनी**(रापरि.४.३) फार काटे असलेली लहान फळांचे गुच्छ येणारी काटेरी वेल.

**–कन्द**–पु., **वनस्पति० सूरणः** ( रापरि.७.६ ) सूरण.

**–कर्णिका**–स्त्री., **वनस्पति० आखुकर्णी** (रापरि.३.२१) उंदीरकानी.

**–कूर्च**–पु., **वनस्पति० नारिकेलभेदः, मधुनारिकेरकः** ( रा. ११.११० ) द्र० '**नारिकेल**' नारळ. मोहाचा नारळ.

**–क्षार**–पु., **लवण० सर्वक्षारः** ( रा. ६.५७ ) सर्वक्षार, धुण्याचा क्षार.

**–गन्ध**–पु., **वनस्पति० कुन्दरुः** ( रा. १२.१९० ) पालख.

**( –गन्धा )**–स्त्री., **वनस्पति० यूथिका** (रा.१०.२५०) जुई.
**जीरकभेदः, कृष्णजीरकः** (रा. ६.१०४)द्र०'**जीरक**' काळे जिरे.
**चम्पककलिका** ( रा. १०.२४० ) चाफ्याची कळी.
न., **वनस्पति० त्वक्** ( रा. ६.७७ ) दालचिनी, भूर्जपत्र.

**–गन्धदा**–स्त्री., **भैषज्य० कस्तूरिका** ( रा. १२.४६ ) कस्तूरी.

**–घातिनी**–स्त्री., **प्राचीना रसाचार्या योगिनी, अनया वृकोदरी गुटिका निर्दिष्टा** ( र. २१.१३८ ) प्राचीन काळातील रसशास्त्रतज्ज्ञ अशी योगिनी. हिने वृकोदरी गुटी सांगितली.

**–छिन्ना**–स्त्री., **वनस्पति० गुडूची** (ध.१.४) गुळवेल.

**–तिक्ता**–स्त्री., **वनस्पति० काकमाची** ( रा. ४.३६ ) कावळी.

**–दलकणिश**–पु., **धान्य० रागी** (रा. १६.१७८) बरगे. पुष्कळ पानांनी वेष्टित कणसांचे गुच्छ येणारे धान्य.

**–दुग्ध**–पु., धान्य० **गोधूमः** ( रा. १६.१५१ ) गहू.
**–धार**–न., खनिज० **हीरकम्** ( ध. ६.५६ ) हिरा.
**–नाद**–पु., भैषज० **शङ्खः** ( रा. १३.२४४ ) शंख.
**–पत्र**–पु., वनस्पति० **मुचकुन्दः** ( रापरि. १०.२५ ) मुचकुन्द.
**पलाण्डुः** ( रा. ७.१०१ ) कांदा.
**(–पत्रा)**–स्त्री., वनस्पति० **गोरक्षदुग्धी** ( रापरि. ५.५३ ) गोरक्षदुग्धी. पुष्कळ पानांची तांबडे दूध असलेली वनस्पती.
**जन्तुका** ( रा. ३.१२७ )
पुष्कळ पानांची तिरक्या लांब खाजकुहिलीच्या फळासारखी फळे असलेली बारीक वेल.
**तरणी** ( रा. १०.२४४ ) शेवंती.
**बृहती** ( असंसू. ८.५१ ) डोरली.
**कुमारी** ( रापरि. ५.१० ) कोरफड.
**मयूरशिखा** ( ड. सुक. १.६७ ) मोरशिखा.
**(– पत्री )**–स्त्री., वनस्पति० **ईश्वरी** ( रापरि. ३.१६ ) तुळस.
**तुलसी** ( रा. १०.७८ ) तुळस.
**बृहती** ( रा. ४.१२१ ) डोरली.
न., खनिज० **अभ्रकम्** ( रा. १३.२ ) अभ्रक.
**–पत्रिका**–स्त्री., वनस्पति० **महाशतावरी** ( ध. १.२९३ ) शतावरी मोठी.
**मेथिका** ( ध. ६.१११ ) मेथी.
**वनमेथिका** ( रा. ५.१८४ ) वनमेथिका.
**भूधात्री** ( रा. ५.१४५ ) भूईआवळी.
**–पर्ण**–पु., वनस्पति० **सप्तपर्णः** ( रा. १२.१३९ ) सातवीण.
**(–पर्णी )**–स्त्री., वनस्पति० **अन्या दोडी** ( रापरि. ४.४१ ) हरीणदोडीचा प्रकार.
**–पाद**–पु., वृक्ष० **वटः** ( ध. ५.७६ ) वड.
**–पादिका**–स्त्री., वनस्पति० **आखुकर्णी** (रापरि. ३.२२) उंदीरकानी.
**–पान**–न., **बहुमद्यपानम् निरग्निस्वेदकरमेतत्** ( चसू. १४.६४ )
पुष्कळ दारू पिणे. अग्नीवाचून घाम आणणारे साधन.
**–पुत्रा**–स्त्री., वनस्पति० **शतावरी** ( सुक. १.६७) शतावरी.
**–पुत्रिका**–स्त्री., ग्रह० ( रेवती, का. बालग्रहचि. ) रेवतीग्रह.
**–पुष्प**–पु., वनस्पति० **पारिभद्रः** ( रापरि. ८.१० ) पारिजातक.
**–पुष्पिका**–स्त्री., वनस्पति० **धातकी** ( रा. ६.१५१ ) धायटी.
**–प्रज**–वि., **बह्वपत्यः** ( चचि. २ (१). १९-२० ) पुष्कळ अपत्ये असलेला.
**तृण० मुञ्जः** ( रा. ८.२०५ ) मुंजतृण, मोळ. धायटी.
**–फल**–पु., वनस्पती० **विकङ्कतः** ( रा. ९.५४ ) पिंपरी, वड, कंकोळ.
**तेजःफलः** ( रापरि. ११.१७ )
सावरीच्या फळासारखे पण सुगंधी फळ असणारा काटेरी वृक्ष.
**( –फला )**–स्त्री., वनस्पति० **शशाण्डुली** (रापरि.७.१३१) धुरकट वाटोळी लहान आंबट पुष्कळ फळांची वनस्पती.
**काकमाची** ( रा. ४.३५ ) काकमाची, कावळी.
**माषपर्णी** ( रा. ३.१७२ ) रानउडीद.
**बृहतीभेदः, क्षविका** ( रा. ४.१२३ ) डोरलीचा प्रकार.
**वालुकम्** ( रा. ७.२५० ) वाळुक.
**मृगाक्षी** ( रा. ७.२५७ ) लहान चिभडे.
**कुडुहुञ्ची** ( रा. ७.२८० ) लहान कारले.
**त्रपुसम्** ( रा. ७.२४६ ) काकडी.
**–फलिका**–स्त्री., **बदरभेदः, भूबदरी** (रा. ११.१६२) द्र० 'बदर' लहान बोर.
**–फेनरसा**–स्त्री., वनस्पति० **सप्तला** ( चक. ११.३ ) शिकेकाई.
**–फेना**–स्त्री., वनस्पति० **सप्तला** ( ध. १.२३८ ) शिकेकाई.
**–बीजा**–स्त्री., वनस्पति० **गिरिकदली** (रा. ११.११२) रानकेळ.
**–मञ्जरी**–स्त्री., वनस्पति० **तुलसी** (ध. ४.५०) तुळस.
**–मूल**–पु., वनस्पति० **शिग्रुः** ( रा. ७.६० ) शेवगा.
**शरभेदः, स्थूलशरः** ( रा. ८.२१२ ) मोठे शरतृण.
**( –मूला )**–स्त्री., वनस्पति० **शतावरी** (रा. ४.४३८) शतावरी.
**माकन्दी** ( रापरि. ७.१५ ) माकन्दी.
सुवासिक पुष्कळ मुळांची काळसर वनस्पती.

**-रन्ध्रिका**-स्त्री., वनस्पति० मेदा ( रा. ५.१६१ )
मेदा. अष्टवर्गापैकी.

**-रस**-पु , वनस्पति० इक्षुः (असंसू. १६.३९; अहृसू. १५.४५ ) उंस.

**-( रसा )**-स्त्री., वनस्पति० तेजोवती (रा. ३.३९२)
मालकांगोणीप्रकार.

**-रुहा**-स्त्री., वनस्पति० गुडूची ( रा. ३.३ ) गुळवेल.

**-रूप**-पु., निर्यास० रालः ( रा. १२.१७७ ) राळ.

**-लवण**-न., लवण० औषरकम् ( रा. ६.५१ )
खारी जमीन, खारटाण.

**-वल्क**-पु., वनस्पति० प्रियालः (ध. ५ .७२) चारोळी.

**-वर्ण**-पु., कीट० पञ्चगोधेरकेष्वेकः, सविषोऽसौ, तेन दष्टस्य शोफो दाहरुजौ च भवतः (सुक.८.२८)
घोरपडीच्या पाच जातीपैकी एक जात-प्रकार. ही विषारी. चावल्याने सूज आग व वेदना होतात.

**-वल्लरी**-स्त्री., वनस्पति० डोडी (शानि.) जीवन्तीभेदः, शिग्रुः, तुलसी (र. १८.४७)
हरीणदोडी, शेवगा, तुळसी.

**-वादिनी**-स्त्री., वनस्पति० भङ्गा (भा.प्र.मिश्रप्रकरण)
भांग.

**-वाहा**-स्त्री., वनस्पति० कण्टकारीभेदः (ध. १.९९)
कांटेरिंगणीचा प्रकार.

**-वीर्य**-पु., वनस्पति० जम्बीरः ( रा. १०.८० )
आंबट लिंबाचा प्रकार, ईडलिंबू.
तण्डुलीयकः ( रा. ५.१७४ ) तांदुळजा.
शाल्मली ( रा. ८.२१२ ) सांवरी.

**( -वीर्या )**-स्त्री., वनस्पति० भूधात्री (रा. ५.१४५)
भूईआवळी.

**-शल्य**-पु., वनस्पति० खदिरभेदः, रक्तखदिरः ( रा. ८.३६ ) द्र० 'खदिर' तांबडा खैर.

**-शाख**-पु., वनस्पति० स्नुही ( रा. ८.३५६ )
त्रिधारी निवडुंग.

**-शिखा**-स्त्री., वनस्पति० महाराष्ट्री ( रापरि. ४.१३ )
मराठी.

**-शूका**-स्त्री., धान्य० व्रीहिः ( रा. १६.११८ )
तांदूळ-भात.

**-संपुट**-पु., वनस्पति० विष्णुकन्दः ( रापरि. ७.४० )
पुष्कळ पुडे असणारा मोठा पाण्यातील लंबगोल कंद.

**-सार**-पु., वनस्पति० खदिरः ( रा. ८.३२ )
खदिर, खैर.

**-सुता**-स्त्री., वनस्पति० शतावरी ( र. १७.३९-४० )
शतावरी.

**बह्वाशिन्**-वि., लक्षण० प्रचुरभोक्ता ( सुउ. ६०.१५ )
खूप खाणारा.

**बहुल**-न., वनस्पति० मरिचभेदः, श्वेतमरिचम् ( रा. ६.१३८ ) द्र० 'मरिच' पांढरे मिरे.

**(बहुला)**-स्त्री., वनस्पति० शतपुष्पा ( रा. ४.२ )
बडीशेप.
ताम्बूली ( धपरि. ३.१ )
विड्याचे पान, पानवेल.

**-गन्धा**-स्त्री., एलाभेदः, सूक्ष्मैला ( रा. ६.६८ ) द्र० 'एला'
लहान वेलची. वेलदोडाप्रकार.

**-च्छद**-पु., शिग्रुभेदः, रक्तशिग्रुः ( रा. ७.६६ )
द्र० ' शिग्रु ' लालशेवगा.

**-वर्त्मन्**-न., नेत्ररोग० बहलवर्त्म ( मा. नि. )
नेत्र रोगाचे नाव, पापणीचा रोग.

**-वल्कल**-पु., वनस्पति० प्रियालः ( ध. ५.७२ )
चारोळी.

**बहेडक**-पु., वनस्पति० विभीतकः ( ध. १.२१२ )
बेहडा.

**बाकुचिका**-स्त्री., वनस्पति० बाकुची ( र. ३०.४७ )
बावची.

**-फल**-न., बाकुचीबीजम् सोमराजीफलम् ( असंउ. ४९ )
बावची बी. ह्या फळालाच सोमराजी फळ असेही नाव आहे.

**बाकुची**-स्त्री., वनस्पति० सोमराजी अवल्गुजा क्षुपः, अस्याः बीजं सुगन्धितैलयुतं गन्धवत्त्वेन प्रसिद्धं त्वग्रोगहरं कुष्ठहरं च ( र. १३.९२ ) गुणाः- कटुतिक्ता, पाके कटुका उष्णा कृमिकुष्ठकफापहा, त्वगदोषविषकण्डूतिखर्जूप्रशमनी, रसायनोपयुक्ता, रुचिमेधाविनाशिनी, पाके कटुका, ग्राहिकुष्ठव्रणापहा ( ध. १.१६७; रा. ४.२२९) श्वेतावल्गुजा-अस्याः फलानि मेधायुःकामार्थमुपयुज्यन्ते ( सुचि. २८.३ ) अस्याः कोमलशिम्ब्यः शाकत्वेनोपयुज्यन्ते । फञ्जी-चिल्ल्यादिगणोक्तः शाकविशेषः ( चसू. २७.१०२; चसू. २७.९६ ) शाकगुणाः कफपित्तहरं, तिक्तं, कटुविपाकं शीतं च ( सुचि. २५.१५; सुसू. ४६.२६५; चचि. १९.३२ )

हिं.—गोवार, वायची, बावची, बकुची.

**म.—बावची.**

गु.—बावची, बावचिनावी.

बं.—हाकुच, सोमराल ( ज ).

त.— वोगी विट्ठल.

बावची. **गुण**—कडु, तिक्त, विपाक कडु, वीर्य उष्ण, कृमि, कुष्ठ, कफनाशक, त्वचेचे दोष विष. कंडू यांचा नाश करणारी. संग्राही, व्रण नाशक आहे. अवल्गुजा नावाचे सुगंधी पांढरे बी असते. त्याचे तेल निघते. बुद्धिवर्धक आणि शुक्रवर्धक आहे. बावची किंवा गवारी या नावाने शेतात लावलेली भाजी. तिच्या कोवळ्या शेंगाची भाजी खातात. त्या भाजीचे **गुण**—कफपित्त नाशक, कडू, कटुविपाक व शीतवीर्य आहेत.

**बाकुल**–न., **बकुलवृक्षसम्बन्धि ( फलम् ), तस्य गुणाः– मधुरं, कषायं, स्निग्धं, संग्राहि, दन्तानां स्थिरीकरं, विशदं च** ( सुसू. ४६.१६९ ) **बाकुलपुष्पं तु शाकत्वेन उपयुज्यते । पुष्पशाकगुणाः–सुगन्धि, विशदं, हृद्यं, श्लेष्मपित्तविषघ्नं च** (सुसू. ४६.२८७ ) बकुळीचे फळ, बकुळीचे फूल. बकुळीच्या **फळाचे गुण**– मधुर, कषाय, स्निग्ध, संग्राहि, दाताना स्थिर व स्वच्छ करणारे आहे. बकुळीचे **फुलांची भाजी**– सुगंधी, विशद, हृद्य, श्लेष्मपित्तविष-नाशक आहे.

**बाढम्**–( अव्य. ) **अत्यर्थम्, भूरि, सातिशयम्** ( अहृसू. ५.२७ ) पुष्कळ, अतीशय.

**बाण**–पु., **वनस्पति० कुरण्टक, नीलसहचरः** ( अहृसू. १५.१७; सुसू. ६.३६; रा. १०.४२०; असंसू. १६.११ ) निळी कोन्हांटी.

**शरः** ( ध. ४.१३५ ) तीर, बाण.

**( बाणा )**–स्त्री., **वनस्पति० कुरण्टकः** ( रा. १०.४२० ) कोन्हांटी.

–**पुङ्खा**–स्त्री., **वनस्पति० शरपुङ्खा** ( रापरि.४.६ ) शरपुंखा, उन्हाळी.

–**वार**–न., **वर्म, बाणं शरीरप्रक्षिप्तं वारयति इति बाणवारः कवचम्** ( सुचि. २४.७४ ) चिलखत.

**बाणासुर**–पु., **प्राचीनो रसाचार्यः** ( र. ६.५० ) रसायनशास्त्रज्ञ बाणासुर.

**बाणाह्व**–पु., **वनस्पति० मुञ्जः** ( ध. ४.१३२ ) मोळतृण. मौञ्जीबंधनात कंबरेला दोरी करून बांधतात.

**बादर**–पु., **वनस्पति० कार्पासी** ( रापरि. ४.४५ ) कापशी, कपाशी.

**बादरायण**–पु., **ऋषि०, रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु सांकृत्यकाप्यबडिशबैजवापिप्रभृतिषु महर्षिषु एकः** ( चसू. १.११ ) एक आयुर्वेद शास्त्रज्ञ ऋषि. रोगनाशनाविषयी विचार-विनिमयासाठी जमलेल्या ( हिमालयाचे उतारावर ) सांकृत्य, काप्यायन, बडिश, बैजवापि प्रभृति-ऋषींच्या समुदायातील एक महर्षि.

**बाधन**–न., **अभेषजप्रकार एकः, तदात्वमात्रबाधकं, यथा स्वल्पमपथ्यम् द्विप्रकारके बाधनसानुबाधनाख्ये अभेषजे इदं प्रथमम्** (चचि. १.५; असंसू. १२.१० ) औषध नाही असे अपाय करणारे द्रव्य. त्याचे प्रकार दोन. जे तत्काल अपाय करते ते बाधन. जसे हवा पाण्याचे तात्काल आणि तात्पुरते होणारे जे अनिष्ट परिणाम त्यांना बाधन म्हणावयाचे; आणि दीर्घकाल रहाणारे कुष्ठ मेहादि विकार करणारे द्रव्य ते सानुबाधन. उदा० दही इ० चे दीर्घकाल सेवन.

**बाधिर्य**–न., **कर्णरोग० श्रवणेऽसामर्थ्यम्** ( चसू. ५.३८ ) **अशीतिवातविकारेष्वेकः** ( चसू. २०.११ ) **संप्राप्तिः—शुद्धः कफान्वितश्च वायुः शब्दवहासु तदा नाडीषु नानाविधान्मार्गान् आवृत्य वर्तते, चिकित्साद्वेषिणो नरस्य असंशय बाधिर्य-नामा व्याधिर्भवति** ( सुउ. २०.८; सुनि. १.८३; सुचि. ५.२३ ) **सामान्यचिकित्सा–बाधिर्ये कर्ण-पूरणम्** ( सुउ. २१.३५ ) बहिरेपणा. कानाचा एक विकार. शुद्ध व कफान्वित वायु शब्दवह नाडीवर आघात करून तसेच अनेक मार्गावर आघात करतो तेव्हा उपचाराचा तिटकारा करणारांना बाधिर्य विकार करतो. त्यावरील **चिकित्सा**–कानात तेल घालून, कापूस घालून कर्णपूरण करावे.

**विधुरसंज्ञितयोर्मर्मणोर्विद्धयोरिदं जायते** ( सु. शा. ६.२७ ) विधुर नामक मर्मावर आघात झाल्यानेही बहिरेपणा येतो.

**बार्हतबीज**–न., (परिव०) **बृहत्या बीजम्** ( अहृसू १५.४ ) डोरलीचे बी.

**बार्हस्पत्य**–वि., **बृहस्पतिना कृतं नाम प्रणीतमिति बार्हस्पत्यम् ( ' नीतिशास्त्रम् ' )** ( चवि. ८.५४ ) बृहस्पतीने केलेले शास्त्र—नीतिशास्त्र,

**बाल**–पु., ऊनषोडशवर्षीयः कुमारः, त्रिविधा बालाः—क्षीरपाः, क्षीरान्नादाः, अन्नादाः इति। तेषु संवत्सरपराः क्षीरपाः, द्विसंवत्सरपराः क्षीरान्नादाः, परतोऽन्नादाः(सुसू. ३५.२९; चवि. ८.१२२) **बालः मृदुभेषजीयानां श्रेष्ठः** (चसू. २५.४०; सुचि. ३५.२१)
सोळा वर्षांचे आतील मूल. त्याचे तीन प्रकार आहेत. केवळ दूध पिणारे मूल. दूध व अन्न खाणारे आणि अन्नच खाणारे. एक वर्ष वयापर्यंत केवळ दुग्धाहार, दोन वर्षेपर्यंत दूधभात इ० अन्न जेवणारे, दोन वर्षांचे पुढे अन्न खाणारे. मृदु औषधे देण्याच्या पात्रतेत बाल श्रेष्ठ.
**गन्धद्रव्य० वालकः** ( र. १०.२२ ) वाळा.
**केशः** ( सुचि. १.४१; सुसू. १.८ (१); ७.१५; सुसू. चवि. ३.१४ ) केस.

**(बाला)**–स्त्री., **अप्राप्तयौवना स्त्री** (सु. शा. १०.५५; यो. रत्नाकरः; अहृसू. १९.८० )
लहान मुलगी. तारुण्यावस्था न प्राप्त झालेली.

**–आमरोगपूर्वरूप**–न., **भविष्यदामरोगस्य बाले पूर्वरूपाणिस्तैमित्यमरुचिर्निद्रागात्रपाण्डुताऽरतिः, रमणाशनशय्यादीन् धात्रीं च द्वेष्टि नित्यशः, अस्नातः स्नातरूपश्च स्नातश्चास्नातदर्शनः दृश्यते। भविष्यतः आमस्य एतानि रूपाणि वैद्यो विद्यात्** ( कासू. २५.३२,३३ )
बालाच्या आमरोगाची पूर्वरूपे—अंग जखडणे, अरुचि, झोप, अवयव पांढरट, बेचैनी, खेळणी-खाणे -झोपणे-दायी यांचा द्वेष, चिडणे, स्नान घातलेला पारोसा व पारोसा स्नान घातल्यासारखा दिसणे ही आमरोगाची पूर्वरूपे होत.

**–क्रीडन**–न., **कृत्रिमहस्त्यश्वबलिवर्दशुकादि** ( सुसू. १६.३ )
लाकूड, माती इ० ची हत्ती, घोडे, बैल, पोपट वगैरे मुलांची खेळणी.

**–क्रीडनक**–न., **बालक्रीडनम्** ( काखिल. १२.६ )
पहा 'बालक्रीडन.'
पु., **भैषज० कपर्दिका** ( ध. ३; परि. २४ ) कवडी.

**–गृह**–न., **कुमारागारम्** ( का. रेवतीकल्प ६९ )
बालभवन. लहान मुलांचे घर.

**–ग्रह**–पु., **बालरोग० आविष्टानां ग्रहाणां सामान्यलक्षणम्—उत्त्रासजृम्भाभ्रूक्षेपदीनताः फेनस्रावोर्ध्वदृष्ट्योष्ठदन्तदंशप्रजागराः रोदनं कूजनं स्तन्यद्वेषः स्वरवैकृतं नखैरकस्मात् स्वधात्र्यङ्गविलेखनम्** (असंउ. ३; सुशा.१०.५१) **तत्र बालग्रहचिकित्सासामान्येन स्नानवस्त्रवसामांसमद्यक्षीरगुडादि यद्येभ्यो यदा रोचते, तत्तेभ्यः प्रयच्छेत्। गन्धमाल्यानि बीजानि, रत्नानि मधुसर्पिषी, भक्ष्याश्च सर्वे सर्वविधग्रहशान्तये भवन्ति**(असंउ.८)
बालग्रह नावाचा रोग. या रोगामध्ये मूल चिडते, जांभया–भिंवया उडवते, गळून जाते, तोंडाला फेस येतो, डोळे वर जातात, दात-ओठ चावते, झोपत नाही, रडते, कण्हते, दूध पिण्याचा तिटकारा करते, आवाज बिघडतो, एकाएकी नखाने आपले किंवा आईचे अंग ओरबाडते वगैरे चिन्हे होतात.
**उपचार**—स्नान, वस्त्र, वसा, मांस, मद्य, दूध, गूळ इत्यादि जे ज्या ग्रहाला आवडते ते त्याला द्यावे. गंध, फुले, बीजे, रत्ने, मध, तूप व भक्ष्ये सर्व प्रकारच्या ग्रहांच्या शांतीकरतां उपयुक्त होतात.

**–पत्र**–पु., **वनस्पति० खदिरः** ( ध. १.२५ ) खैर.
**यासः** ( ध. १.२२ ) धमासा.

**–पुष्पा**–स्त्री., **वनस्पति० यूथिका** (ध. ५.१४८) जुई.

**–पुष्पिका**–स्त्री., **वनस्पति० यूथिका** (रा. १०.२५०) जुई.

**–बन्ध**–पु., **पारदबन्ध०, समभागाभ्रकेण जारितः पारदः** ( र. ११.८२ )
समभाग अभ्रक जीर्ण केलेल्या पाऱ्याचा बंध.

**–बिल्व**–न., **अपक्वं बिल्वफलम्** ( र. २२.८८ )
बाळ ( कोवळे ) बेलफळ.

**–भेषजमात्रा**–स्त्री., **बालव्याधिषु भेषजमात्राऽल्पा भवितुमर्हति। तत्र हेतुः– निवृत्तिर्वमनादीनां, मृदुत्वं, परतन्त्रताम्, वाक्चेष्टयोरसामर्थ्यं च, वीक्ष्य, बालेषु भेषजं स्वल्पमात्रं तु यथाव्याधि प्रयोजयेत्** ( चचि. ३०.२८४ )
मुलांची औषधाची मात्रा म्हणजे प्रमाण अल्प असावे. कारण त्यांना वांतीचे औषध देता येत नाही. शरीरधातु मृदु असतात. पारतंत्र्यात असतात, चालता, बोलता येत नाही.

**–भैषज्य**–न., **भैषज्य० रसाञ्जनम्** ( रा. १३.२२१ )
रसांजन.

**–भोज्य**–पु., **वनस्पति० चणकः** ( र. १६.१५६ )
हरबरा, चणा.

**–रोग**–पु., **बालानां व्याधयः** (शार्ङ्गधर. पू. ७.१८६) **तल्लक्षणानि— अङ्गप्रत्यङ्गदेशे तु रुजा यत्रास्य**

जायते, तं मुहुर्मुहुः स्पृशति, स्पृश्यमाने च रोदिति रोगे मूर्धस्थे सति निमीलिताक्षः सन् शिरोधारणेऽसमर्थो भवति । बस्तिस्थे मूत्रसङ्गार्तो रुजा तृष्यति मूर्च्छति च। विण्मूत्रसङ्गवैवर्ण्यच्छर्द्याध्मानान्त्रकूजनैः कोष्ठे दोषान् विजानीयात् । रोदनैः दोषान् सर्वतो व्याप्तान् जानीयात् ( सुशा. १०.३४-३६ )

बालरोग. लहान मुलाच्या ज्या अवयवाला दुःख होते तेथे ते मूल सारखे हात लावते; अथवा इतरांनी स्पर्श केला तर रडते. शिरोभागात जर विकार असेल तर मूल डोळे बंद करून पडून राहाते मान सावरणे सुद्धा त्याला अशक्य होते. लघ्वी अडली तर मूत्राशयात ठणका उत्पन्न होतो. तहान फार लागते, आणि मूल बेशुद्ध होते. विष्टा, मूत्रसंग, शरीर वैवर्ण्य, ओकारी, आध्मान, आतड्यामध्ये गुरगुरणे यावरून दोष कोष्ठात बिघडले आहेत असे समजावे. भयंकर रडण्याने दोष बिघडून शरीरभर व्यापले आहेत असे समजावे.

**–वर्ति**–स्त्री., केशरचितवर्तिः ( सुचि. २.६९ ) इयं शिरसो व्रणे उपयुज्यते ( सुचि. २.७० )
केसांची वात. ही डोक्याच्या व्रणात उपयुक्त.

**–वेणी**–स्त्री., केशकृता वेणी ( चशा. ८.४१ )
केसांची वेणी.

**–व्यजन**–न., केशमयं वीजनसाधनं; चामरम् ( सुचि. ४.२९; सुचि. २४.८२ )
केसांचा पंखा, चवरी.

**बालक**–न., वनस्पति० मरीचम् ( रा. ६.१३८ ) मिरे.

**–प्रिया**–स्त्री., वनस्पति० कदली (रा. ११.१०७)केळ.
इन्द्रवारुणी ( रा., ३.३७२ ) इंद्रावण.

**बालाङ्गुलि**–स्त्री., कनिष्ठाङ्गुलिः, अनुशस्त्रेष्वेका आवश्यके एषणकर्मणि एषण्या अनुपलम्भे बालाङ्गुलिरङ्कुरीश्च उपयोज्याः ( सुसू. ८.१५ तः १९ )
कनिष्ठ अंगुलि, करांगळी. एक उपशस्त्र. एषणीच्या ऐवजी उपयुक्त.

**बालामलक**–न., आमलकं बालम् ( असंउ. ३७ )
बाळआवळा, कोवळा आवळा.

**बालाम्र**–न., आमाम्रं जाताजातबीजमपक्वाम्रम् ( र. १०.९४ ).
बाळआंबा, आठळी न बनलेली–कोवळी कैरी.

**बालेन्दुकुटिला**–वि. बालचन्द्रलेखावद् वक्रा ( राजी ) ( चइ. ११.१३ ) चंद्रकोरीप्रमाणे वाकडी.

**बालेष्ट**–पु., न., वनस्पति० बदरम् ( ध. ५.९६ ) बोर.

**बालोपचरणीय**–वि., बालोपचरणमधिकृत्य कृतोऽध्यायविशेषः ( असंउ. १ )
अध्यायाचे नाव. मुलांच्या रोगांचे उपचार सांगितलेला अध्याय.

**बाल्य**–न., षोडशवर्षपर्यन्तं वयोऽवस्था ( र. ११.९६; सुसू. ३५.२९ )
बालकत्व, १६ वर्षे वयापर्यंत वयाची अवस्था.

**बाह्लीक**–न., भैषज्य० कुङ्कुमम् (असंसू. ८.१०३) केशर.

**बाह्लिक**–पु., ऋषि० काङ्कायनबाह्लीकः ( चसू. १२.६ )
बाह्लीक नांवाचा ऋषि.
देश० ( चवि. १.१८; चचि. ३०.३१६ )
बाह्लीक देश. पंजाबातील एक प्रदेश—बियास नदीच्या पश्चिमेस.
न., भैषज्य० कुङ्कुमम् ( चचि. २३.१०२; चचि. ३०.९१; सुक. ६.३ ) केशर.
निर्यास० हिङ्गु ( ध. २.२६; र. ५.१२८ ) हिंग.

**–भिषज्**–पु., महर्षि० ( चसू. २६.५ ) एक महर्षि.

**बावन**–न., वनस्पति० चन्दनम् ( रा. १२.३ ) चंदन.

**बाष्कयणपयस्**–न., बहुवारं प्रसूता प्रौढवत्सा वा गौः बष्कयणी, बष्कयिणी वा, तस्याः दुग्धम् (असंक. ८) तत्क्षीरं पुंस्यं रतिप्रदं च ( असंउ. ५० )
बऱ्याच वेळा व्यालेल्या गाईचे दूध. अथवा जिचे वासरू मोठे झाले आहे अशा गाईचे दूध. हे दूध मैथुनशक्ति वाढवणे व पुत्रप्राप्तीसाठी उपयुक्त.

**बाष्प**–न., अश्रु (चसू. ७.४) रोदनजलम् (सुसू.२१.१९)
डोळ्यातील अश्रु.

**(बाष्पी)**–स्त्री., वनस्पति० हिङ्गुपत्री ( रा. ६.६२ )
हिंगुपत्री, बाफळी.

**–द्वय**–न., वनस्पति० बाष्पिकाद्वयं, तच्च लोहितं कृष्णं च सिन्धुदेशे प्ररोहति ( सुचि. ४.३२ )
बाष्पिका, बाफळी. प्रकार दोन. लाल व काळी. सिंध प्रांतात वाढते.

**–निग्रह**–पु., अश्रुनिग्रहः ( चसू. १७.१० )
द्र० ' उदावर्त ' अश्रु आवरणे–अडविणे.

**–निग्रहण**–न., अश्रुनिग्रहः ( चसू. ७.२२ )
अश्रु अडविणे.

**–रोधज**–वि., अश्रुनिग्रहजनितः ( व्याधिः ) (अहसू. ४.१६) अश्रु अडवित्यामुळे झालेला रोग.

**–समुच्छ्रय**–पु., लक्षण० समुच्छ्रयो बाहुल्यमाधिक्यं वा, तेन बाष्पसमुच्छ्रयोऽश्रुबाहुल्यम् (सुउ. ६.७)
अश्रूंचे आधिक्य.

**बाष्पावेग**–पु., **शोकोत्थतेजस उद्रेकः** ( सुउ. ४०.१३ ) शोकामुळे शरीरस्थ तेजोधातूचा ( पित्ताचा ) उद्रेक होणे.

**बाष्पिका**–स्त्री., **वनस्पति० हिङ्गुपत्री** ( ध. २.३८; असंसू. १२.६४ ) बाफळी.
**जीरकभेदः** ( असंचि. ६; असंचि. १६ ) जिऱ्याचा प्रकार.

**बास्त**–वि., **बस्तोद्भवम्, बस्तसम्बन्धि, यथा–बास्तं मूत्रं नाम छागमूत्रम्** ( चशा. ८.१०; चचि. १०.२६ ) बोकडाचे ( मल, मूत्र, शिंग इ० )

**बाहु**–पु., **ऊर्ध्वशाखा, कक्षातः अंगुल्यग्रपर्यन्तोऽवयवः, षडंगेष्वेकमंगम्** ( चशा. ७.५ ) सहा प्रमुख शरीर अंगांपैकी एक. काखेपासून बोटांचे पेरापर्यंत लांबीचा अवयव. ( हात ).
**अंसकूर्परयोरन्तरम् प्रत्यङ्गमेकम्** ( सुशा. ५.४; सुचि. ३.३७ ) अंस ( खांदा ) व कोपर यांमधील अवयव. हे एक प्रत्यंग आहे.

**–द्वयप्रतिपन्न**–वि., **द्वाभ्यां बहुभ्यामुपेतः अष्टसु मूढगर्भेषु एक एवंगुणोपेतः** ( सुचि. १५.९ ) ८ पैकी मूढगर्भाचा एक प्रकार. दोन्ही हात अगोदर पुढे आलेला गर्भ.

**–नलक**–पु., **बाह्वोः स्थितोऽस्थि० द्वा बाहुनलकौ** ( चशा. ७.६ ) द्र० ' **अस्थि** ' हाताची नळी. बाहूचे हाड. ही दोन आहेत.

**–पिण्डिका**–स्त्री., **प्रत्यङ्ग० षट्पञ्चाशत्प्रत्यङ्गेषु एका, द्वे बाहुपिण्डिके** (चशा. ७.११) दोन बाहुपिंडिका, हाताचा मांसल भाग. हाताची पिंढरी.

**–भग्न**–न., **लक्षण० बाहुसंधिस्खलनम् द्र० ' भग्न '** ( सुचि. ३.३७ ) हाताचा सांधा निखळणे, हाताची नळी तुटणे.

**–मर्मन्**–न., **शारीर० ऊर्ध्वशाखाश्रितं मर्म, बाहुमर्माणि एकादश–क्षिप्र–तलहृदय–कूर्च–कूर्चशिरो–मणिबन्धेन्द्रबस्ति–कूर्पर–आणी–ऊर्वी–लोहिताक्षाणि कक्षधरं चेति** ( सुशा. ६.६ ) द्र० ' **मर्म.** ' बाहुमर्मे. ही अकरा. नावे वर आहेत.

**–मित**–वि., **बाह्वोर्द्विसंख्यात्वेन बाहुमितं नाम भागद्वययुतम्** ( र. १७.१३७ ) दोन भागांनी युक्त. ( बाहु दोन म्हणून ).

**–मूर्धन्**–पु., **शारीर० बाहुशिरः** (सुशा. ६.२६) हाताचे डोके. वरचा शेंडा–टोक.

**–वीर**–पु., **वनस्पति० श्लेष्मातकः** (ध. ५.९४) भोकर.

**–शूल**–पु., **लक्षण० बाह्वोः शूलः** ( चसि. २.१६ ) हाताचा दुखावा.

**–शोष**–पु., **लक्षण० बाह्वोः शुष्कत्वं कार्श्यं वा अशीतिवातविकारेष्वेकः** ( चसू. २०.११; चसि. २.१६ ) **अंसफलकमर्मणि विद्धस्य लक्षणम्** ( सुशा. ६.२६ ) हात वाळणे किंवा बारीक होणे. ऐंशी वातविकारांपैकी एक. अंसफलक मर्माचा वेध झाल्याचे लक्षण.

**–श्रुत्य**–न., **बहुश्रुतस्य भावः, भूयोविद्यत्वम्** ( असंसू. २.१३ ) बहुश्रुतत्व, पुष्कळ माहिती असणारा.

**–स्तम्भ**–पु., **लक्षण० बाह्वोः स्तम्भः** ( चसि. २.१६ ) बाहु जखडणे.

**–स्वाप**–पु., **लक्षण० ऊर्ध्वशाखायाः सुप्तता, विद्धांसफलकमर्मणो लक्षणम्** ( चशा. ६.२६ ) बाहूचे बाधिर्य–बहिरणे–स्पर्श न कळणे. अंसफलकमर्माचा वेध झाल्याचे चिन्ह.

**बाहुल्य**–न., **स्थूलता** ( सुउ. १.१९ ) लठ्ठपणा.

**बाहुल्यानुशय**–पु., **अनुशेते अनुबध्नाति इति अनुशयः, अनुबन्धः सम्बन्ध इति यावत्, तेन भूरिसंबंधः** ( चसू. ८.६ ) घनिष्ठ संबंध.

**बाह्य**–वि., **उपरितनम्** ( सुउ. २३.५ ) बाहेरचे, वरचे.
**आगन्तुः बाह्यनिमित्तजः** ( सुउ. १.२९ ) बाह्य कारणांनी निर्माण झालेले.

**–ज**–वि., **आगन्तुकारणोद्भूतो नेत्ररोग०, स द्विविधः– सनिमित्तोऽनिमित्तश्च, निमित्तमभिघातादि, सनिमित्तो बाह्यजो नाम अभिघाताद्युत्पन्नः, अनिमित्तो बाह्यजो नाम सुरर्षि-गन्धर्वादिदर्शनाभिहतशक्तिः** ( सुउ. १.४३ ) बाह्य कारणांनी निर्माण झालेले नेत्ररोग. प्रकार २. सकारण व अकारण. (१) आघातादि कारणांनी होणारा सकारण व (२) देव, ऋषि, गंधर्वादिकांच्या दृष्टि इत्यादींनी झालेला अकारण.

**–द्रुति**–स्त्री., **बहिरेवाभ्रकसत्वादिकं द्रुतं कृत्वा विहिता पारदद्रुतिः, जार्यमाणानामभ्रकादि लोहानां बहिरेव द्रुतिं कृत्वा रसरूपाणां तेषां रसे द्वन्द्वमेलापनम्** ( र. ८.८१ ) अभ्रक, लोह, गंधक इत्यादींची द्रुति बाहेर करून पाऱ्यात मिसळणे.

**–मल**–पु., **बाह्यमलायने स्थितो मलः** ( चवि. ७.१० ) त्वचेच्या रंध्रातून बाहेर येणारा मळ. केश, वस्त्रादींना लागणारा मळ.

**–मार्ग**–पु., **बाह्यरोगमार्गः, रोगमार्गाणां त्रयाणामेकतमः, तत्र रक्तादयो धातवस्त्वक्च बाह्यरोगमार्गः; तदाश्रया व्याधयो मण्डलकुष्ठव्यङ्गगण्डालज्यर्बुदादयः** (अहसू.१२.४४ तः ४८; सुनि.५.३) बाह्यरोगमार्ग–रक्तादि धातू व त्वचा ही बाह्यरोगमार्गाची ठिकाणे. तदाश्रयी वांग, कुष्ठ, गलगंड इत्यादि रोग होत.

**–रोगायन**–न., **बाह्यरोगमार्गः** ( अहसू. १२.४४ ) बाह्यरोगमार्ग.

**बाह्यकी**–स्त्री., **सविषकीट० अग्निप्रकृतिकोऽयं पित्तजरोगकृत्** ( सुक. ८.९.१२; असंउ. ४३ ) बाह्यकी नावाचा विषारी कीटक. हा अग्निप्रकृतीचा असून चावल्यास पित्तज रोग होतात.

**बाह्यायाम**–पु., **रोग० बहिरायामः वातरोगोऽयं पृष्ठे देहनमनात्मकः बाह्यस्नायुप्रतानस्थो वायुः बाह्यायामं करोति** ( सुनि. १.५७; चचि. २८.३५) द्र० **' आयाम '**
शरीर बाहेरच्या बाजूला पाठीकडे ताणले जाणारा आचका. वातरोगात होणारा एक रोग. या रोगात बाह्यस्नायूंच्या शाखांमध्ये वायूची दुष्टि पोचलेली असते.

**बिज्जुल**–न., **वनस्पति० त्वक्** ( रा. ६.७७ ) दालचिनी.

**बिड**–न., **लवणभेदः । बिडलोण इति लोके । बिलति भिनत्ति मलं बिडम् । तैक्ष्ण्यादौष्ण्याद् व्यवायित्वादीपनं शूलनाशनम्, कफवातानामूर्ध्वाधोऽनुलोमनम्** ( चसू. २७.३०२ ) **उष्णं तीक्ष्णं सक्षारं दीपनं सूक्ष्मं शूलहृद्रोगनाशनं रोचनं वातानुलोमनं च** ( सुसू. ४६.३१६ ) **कफवातघ्नं गुल्ममेहघ्नं च** ( ध. २.२८ ) **पारदे अभ्रकसुवर्णादीनां जारणकर्मणि सहाय्यकः कल्पः क्षारैर्यवक्षारादिभिरम्लैर्जंबीरादिभिर्गन्धाद्यैर्गन्धकादिभिर्मूत्रैर्गोमूत्रादिभिः सैन्धवादिभिर्लवणैः पारदकवलस्य जीर्णकरणार्थं यन्निर्मितं तद्बिडमिति परिकीर्तितम्** ( र. ८.८५ ) बिडलोण. लवणाचा भेद. मलाचा भेद करणारे मीठ. तीक्ष्णत्वामुळे, उष्णतेमुळे, व्यवायीगुणामुळे व दीपनकार्यामुळे शूलघ्न आहे. कफवाताला ऊर्ध्व व अधोमार्गाने अनुलोम करणारे आहे. थोडे क्षारधर्मी, सूक्ष्म असून हृद्रोगनाशक, रुचिकर, गुल्म व मेहरोग नाशक आहे. पाऱ्याच्या संस्कारकार्यामध्ये अभ्रक, सुवर्ण यांचे ग्रास जिरण्याकरिता सहाय्यक पदार्थ. क्षार, यवक्षार, आंबट लिंबाचा रस, गंधक, गोमूत्र वगैरे निरनिराळ्या प्रकारची मूत्रे, सैंधवादि लवणे यांच्या संमिश्रणाने निर्माण झालेला पदार्थ म्हणजे बिड.

**–मूषा**– स्त्री., **मूषा० विविधमृद्भिर्निर्मिता विविधैर्बिडैश्च विलेपिता मूषा इयं देहलोहार्थयोगोपयोगिनी** ( र. १०.१९ )
मूस. निरनिराळ्या मातींनी निर्मिलेली व निरनिराळ्या पारद जारणोपयोगी द्रव्याने लपेटलेली मूस. आरोग्योपयोगी रसायने करण्यासाठी व किमयेसाठी हिचा उपयोग होतो.

**बिडाल**–पु., **उपक्रम० नेत्रलेपः** ( असंउ. १९ ) द्र० **' बिडालक '** डोळ्यावरील औषधी लेपाचे नाव.
**प्राणि० मार्जारः** ( सुचि. ४.१७ ) **षट्प्रकारको मार्जारः–ग्राम्यो वन्यस्तोयजातः पक्षिमार्जारो विजक सुगन्धवृषणश्च** ( सुउ. ४१.३६ ) **अस्य सद्यस्कं रक्तं पिच्छिलवस्त्युपयोगि** ( सुचि. ३८.८६ )
मांजर. प्रकार सहा. नांवे वर आहेत. याचे ताजे रक्त पिच्छाबस्तीकरिता उपयोगी.
**प्रमाण०, कर्षः** (का. उदावर्त चि.) कर्ष–१ तोळा.
**न., खनिज० हरितालम्** ( ध. ७.११९ ) हरताळ.

**–पदक**–न., **मान० कर्षः** ( असंक. ८; चचि.१३.१६० ) **द्वौ द्रङ्क्षणौ बिडालपदकम्** ( चक. १२.९० ) **निष्कचतुष्टयं बिडालपदकम्** ( र. ११.४,५; का. शतपुष्पाक; सुसू. ३९. १४ ) प्रमाण. १ तोळा.
**पु., उपक्रम० बिडाललेपः** ( असंउ. १४ ) द्र० **' बिडालक '** कपाळ व डोळे यावर लेप.

**बिडालक**–पु., **नेत्रवर्त्मोपरि लेपः नेत्रबहिर्लेपः, नेत्ररोगलक्षणेष्वव्यक्तेषु पक्ष्मपरिहारेणाक्षिकोशालेपनम्** ( चचि. २६.२३१; असंसू. ३२.३ )
नेत्ररोगाची लक्षणे. अस्पष्ट असताच डोळ्याच्या बाहेर पापण्या सोडून केलेला लेप.

**(बिडालिका)**–स्त्री., **लक्षण० शोफभेदः, तल्लक्षणं–भृशार्तिः, सदाहरागो, गलस्य सन्धौ, चिबुके, गले, श्वासवहनाडीषु च शोफः, स कृत्स्नगलवेष्टकत्वेन वलयाकारश्चेद् असाध्यो भवति** ( चचि. १२.७६ )
बिडालिका नावाचा एक शोथप्रकार. **लक्षणे**— अतिशय वेदना, आग, लाली; गळ्याच्या सांध्यात,

हनुवटीवर, गळ्यात व श्वासवह नाडीत सूज. हा सर्व गळ्याला वेढूनअसला तर असाध्य.

**बिन्दु**–पु., **प्रदेशिन्यङ्गुलीपर्वद्वयान्मग्नसमुध्दतात् यावत्पतति तावन्मात्रोऽसौ बिन्दुः** ( सुचि. ४०.२८; अहृसू. २०.१०-११ )
थेंब. आंगठ्याजवळचे बोट (तर्जनी) द्रव द्रव्यात २ पेरे बुडवून बाहेर काढल्यावर त्यांचे पडणारे थेंबास बिंदु म्हणतात.
**वर्तुलच्छेदः** ( असंउ. ४१ ) वर्तुलाकार छेद.
**लक्षण० बिन्द्वाकारा त्वग्विकृतिः** (चचि.२३.११४) बिंदूप्रमाणे अंगावर येणारे फोड.
**रत्नदोष० बिन्दुवदाकारः आवर्तवर्तक भालबिन्दुयवाकृतिरूपः** ( र. ४.३६ )
रत्नदोष. आंत भोवरा थेंब इ. असलेला दिसणे.
**उपक्रम० अग्निकर्मभेदः, तत्र वलयबिन्दुविलेखाप्रतिसारणानीति दहनविशेषाः** ( सुसू. १२.११ ) **द्र० ' अग्निकर्म '**
अग्निकर्माचा प्रकार. वाटोळे, थेंब, रेषाकृति डाग देणे व ओरपणे असे चार प्रकार. बिंदु हा त्यापैकी एक.
**–पत्र**–पु., **वनस्पति० भूर्जः** (रा.परि.९२२) भूर्ज पत्र.
**–पात**–पु., **आश्चोतनविधौ कनीनकदेशे औषधस्यावसेचनम्** ( असंसू. ३२.४ )
डोळ्यात औषधाचे थेंब सोडणे.
**–फल**–न., **मौक्तिकम्** ( रा. १३.६७ ) मुक्ता, मोती.
**–राजि**–पु., **सर्प० राजिमान् सर्पः** ( सुक. ४.३४ ( ३ ) ) सर्प.

**बिन्दुल**–पु., **सविषकीट० अग्निप्रकृतिकोऽयं पित्तजरोगकृत्** ( सुक. ८.९; असंउ. ४३ )
बिंदुल या नावाचा विषारी प्राणी. अग्निप्रकृतीचा, पित्तरोग करणारा.

**बिभीत**–पु., **वनस्पति० बिभीतकः** (असंउ.३.२०) बेहेडा.

**बिभीतक**–पु., **प्रसिद्धवृक्ष० बिभीतकः मुस्तादिगणे एकं द्रव्यम्** ( सुसू. ३८.५४ ) **ज्वरहरगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१६ ) **गुणाः– बिभीतकफलं कषायं स्वादुपाकं, उष्णवीर्यं, कफपित्तनुत्, हिमस्पर्शं भेदनं, कासनाशनं, रूक्षं, नेत्रहितं, केश्यं, कृमिवैस्वर्यनाशनं च। बिभीतकमज्जा तृट्छर्दिकफवातहरो, लघुः कषायो, मदकृच्च** (भा. प्र.) **स्नेहयुक्तद्रव्य०** ( चसू. १३.१० ) **सरं, कटु, चक्षुष्यं कफास्रहरं च** (ध. १.२१४) **पलितघ्नः** (रा. ११.३२४)
हिं.—भैरा, बहेरा, भेरा, सागोना, भरला, बुहुरा.
**म.—बेहडा, बेहरा, बेडा, येहेला बेहेडा.**
गु.—बेरंग.
बं.—बोहेरा, बाहेरी, भैरा, बुहुरु, बोथरा.
त.—तानी, थानी, कट्टू, एलूपाय, तान् रिक्काथ्, तान्डी तोन्डा, चट्टु एलुपा, तामकै, वल्लैमुर्डे, तानिकोइ, तान्क्कै.
बेहडा. हे त्रिफळ्यातील प्रख्यात औषध आहे. मुस्तादि व ज्वरहरगणातील एक द्रव्य. बेहड्याचे (फळाचे) **गुण**—रसाने तुरट, पचनानंतर गोड, उष्णवीर्य, कफपित्तशामक, स्पर्शाला थंड, मलभेदक, खोकलानाशक, रूक्ष, नेत्राला हितकारक, केसांना हितकारक, कृमि व स्वरविकृति नाशक. बेहेड्याचे फळांतील मज्जा—तहान, ओकारी, कफवात नाशक आहे. (पचनास हलकी, तुरट, मदकारक आहे.) हे तेलयुक्त द्रव्य आहे. सारक, तिखट, रक्तपित्तहर, केस पिकण्याचा विकार कमी करणारे.
**–तैल**–न., **स्नेह० बिभीतकमज्जातैलम्; तद्गुणाः–स्वादु, हिमं, केश्यं, पित्तानिलापहं च, मधुरतैलगणोक्तमेकम्** ( सुसू. ४५.१२०; ध. ६.१३६ )
बेहेड्याचे मगजाचे तैल. हे गोड तेलाच्या वर्गातले. गोड, थंड, केसांना हितकर, पित्तवात नाशक.
**–फल**–न., **आक्षफलम्** (सुसू. ४६.२००)
बेहडाफल.
**–सीधु**–पु., न., **आसुत० बिभीतकक्वाथगुडकृतो धातकीकुसुमादिकृतसंस्कारः सीधुः, तद्गुणाः– पाण्डुरोगघ्नो, व्रण्यः, संग्राहको, लघुः, कषायो, मधुरः, पित्तघ्नोऽसृक्प्रसादनश्च** ( सुसू. ४५.१८६ )
बेहेड्याचा काढा. गूळ, धायटीची फुले घालून केलेली दारु. पांडुरोगी, व्रणी यांना चांगली. मळ बांधणारी, हलकी, तुरट, गोड, पित्तघ्न, रक्तप्रसादक.
**–सुरा**–स्त्री., **आसुत० बिभीतकस्य वल्कलैः सह कृता सुरा, वल्कलीति केचित्, तद्गुणाः–रूक्षा, नातिकफा, वृष्या, पाचनी च** ( सुसू. ४५.१७९ )
बेहेड्याच्या सालीची दारु. ही रूक्ष, थोडा कफ करणारी, पाचक व शुक्राला हितकर.

**बिभीषण**–पु., **वनस्पति० नलः** ( ध. ४.१४१ ) नळ.

**बिम्ब**–न., **मण्डलं नितम्बस्य, हाराणचन्द्रोऽत्र बिम्ब इति पठित्वा बिम्बः सच्छिद्रं त्रिकास्थि इति व्याख्याति** ( सुशा. ५.११ )

ढुंगणाचा गोल भाग. हाराणचंद्रमताने त्रिकास्थि. ( माकडहाड ).

वनस्पति० बिम्बी ( असंसू. ७ ) तोंडले.

**बिम्बी**–स्त्री., वनस्पति० फलशाकभेदः, अस्याः फलमोष्ठोपमं रक्तवर्णमस्ति । बिम्बीफलं द्विविधं स्वादुरसं तिक्तरसं चेति । तत्र स्वादुरसं बिम्बीफलं शाकत्वेनोपयुज्यते ( चसू. २७.१४२ ) स्वादुरसबिम्बीफलगुणाः–मधुरं कषायं शीतं रूक्षं संग्राहकं कफपित्तहरं स्तन्यकृत् तृड्दाहज्वरपित्तासृक्कासश्वासक्षयापहम् (सुसू.४६.१६४) कफापहा वान्तिविषारोचकास्रपित्तघ्नी ( ध. १.२०३ ) मूलमस्या वमनकरं शिरोविरेचनं च ( चसू. १.७८ )

हिं.—कंदूरी.

म.—रानतोंडले, तोंडली.

गु.—घोली.

बं.—तालाकुचा.

त.—कोवाई.

फा.—कबरे हिंदि.

तोंडले. फळभाज्यापैकी एक. त्याचे दोन प्रकार आहेत. ( १ ) कडू ( २ ) गोड. यांपैकी गोड तेवढेच भाजीला वापरतात. तोंडल्याचे **गुण**— गोड, कषाय, शीत, रूक्ष, संग्राहक, कफपित्तहर, स्तन्य करणारे, तहान, दाह, ज्वर, पित्तरक्त, खोकला, श्वास, क्षयनाशक आहे. कफ, वांती, विष, अरुचि, रक्तपित्त नाशक आहे. याचे मूळ ओकारी करणारे व शिरोविरेचनाला उपयोगी आहे.

**–फल**–न., फलशाक० ( सुसू. ४६.१७६ ) बिम्बी तोंडली.

**–लोट**–पु., भिल्लोटो हिमाद्रिजो वृक्षः (सुउ. १२.११) हिमालयातील भिल्लोट नावाचा वृक्ष.

धान्य० व्रीहिः ( रा. १६.९७ )

एका जातीच्या तांदळाचा वर्ग.

**–शालिक**–पु., धान्य० व्रीहिः, ( १६.९७ ) तांदूळ.

**बिम्बिशी**–स्त्री., रोग० प्रवाहिका ( र. १६.४१ ) आमांश.

**बिम्बिसी**–स्त्री., रोग०, प्रवाहिका ( र. ३०.३३; असंचि. ११ ) आमांश.

**बिम्बीतिका**–शाक० कुन्दुरिका, तस्याः पत्राणि गृह्यन्ते ( सुसू. ४६.२४९ ) कुन्दुरिका भाजी.

काळी सावरी–कोवळी पाने घेतात.

**बिलशायिन्**–वि., बिलेशयः श्वाविच्छल्लकादि प्राणि० एतेषां मांसं शूलरोगे प्रशस्तम् ( सुउ. ४२.९१ ) बिळामध्ये रहाणारे साळू पक्ष्यासारखे प्राणी. याचे मांस शूलरोगात प्रशस्त.

**बिलेशय**–पु., प्राणिवर्ग०, बिले बाहुल्येन शेरते इति बिलेशयः, श्वाविच्छल्यकगोधाशशवृषदंशलोपाकलोमशकर्णकदलीमृगप्रियकाजगरसर्पमूषिकनकुलमहाबभ्रुप्रभृतयो बिलेशयाः ( सुसू. ४६.७८) तेषां सामान्यगुणाः–एते वर्चोमूत्रं संहतं कुर्युः, स्वादुपाका उष्णा स्निग्धा; वातं हन्युः, श्लेष्मपित्ते च कुर्युः, किञ्चैते कासश्वासकार्श्यापहाश्च (सुसू.४६;७९; चसू. ६.१२; सुउ. ४१.३६; सुशा. ४.४५; ध. परि. २.५)

बिळात प्राधान्याने रहाणारे प्राणी. त्यांचे सामान्य **गुण**—पचल्यावर मधुर, उष्ण, स्निग्ध, मूत्र-पुरीष यांची प्रवृत्ति कमी करणारे, वातनाशक, श्वास, खोकला, कृशता नाशक, कफपित्त करणारे. साळई, घोरपड, ससा, रानमांजर, अजगर, सर्प, उंदीर, मुंगुस इत्यादी प्राणी.

**–वर्ग**–पु., बिलेशयप्राणिसमूहः ( अहसू. ६.४७ ) बिळात राहाणाऱ्या प्राण्यांचा समूह.

**बिल्व**–न., मान०, 'पलम्' द्वे पलार्धे बिल्वम् ( चक. १२.९२; असंक. ८; र. ११.६ )

प्रमाण ४ तोळे.

पु., वनस्पति०, बृहत्पञ्चमूले एकं द्रव्यम्, आस्थापनोपगगणे, अर्शोघ्नगणे, श्वयथुहरगणे, अनुवासनोपगगणे च एकं द्रव्यम् (चसू. ४.११-१६) अणुतैलयोगे एकं द्रव्यम् ( चसू. ५.६४ ) पित्तश्लेष्मातिसारघ्नपेयायामुपयुज्यते ( चसू. २.२० ) अस्य काष्ठं दन्तधावने निषिद्धम् ( असंसू. ३.२० ) अस्य पुष्पाणि अञ्जने उपयुज्यन्ते ( सुउ. १२.११) बिल्वमूलगुणाः–मधुरं, त्रिदोषच्छर्दिशूलनुत्, लघु मूत्रकृच्छ्रहरं, त्रिदोषघ्नं च ( निघण्टुरत्नाकरे ) ( ध. १.१०४; रा. ११.१३७ ) बिल्वं सांग्राहिकदीपनीयवातकफप्रशमनानां श्रेष्ठम् ( चसू.२५.४०) पक्वं बिल्वफलं–दुर्जरं दोषलं पूतिमारुतम्, आमं तु स्निग्धोष्णतीक्ष्णं, कफवातजित्, दीपनं च ( चसू. २७.१३८ ) अम्लं संग्राहि ( ध. १.१०८ ) गुरु (रा. ११.१३७) गुणाः–बिल्वो, मधुरो, हृद्यः, कषायः, पित्तजित्, गुरुः, कफज्वरातिसारघ्नो,

रुचिकृत्, दीपनः, परः (रा. ११.१३६) पक्वं बिल्वफलं-मधुरानुरसं, गुरु, विदाहि, विष्टम्भकरं, दोषकृत्, पूतिमारुतम्, (ध. १.१०९) कटुतिक्त-कषायोष्णं संग्राहि त्रिदोषजित् (रा. ११.१३६)
हिं.—बेल, बील श्रीपल.
म.—**बेल.**
गु.—बिल्वफल, बिलिनुं फळ.
बं.—बेल; बील.
त.—बिल्वम्, बिल्वपझम्.
फा.—शुल्.
बेल. बृहत्पंचमूलांपैकी एक. हे आस्थापन, अर्शोनाशक, शोथनाशक, अनुवासनोपयोगीगण यांमधील एक द्रव्य आहे. याची काडी दंतधावनासाठी उपयोगात आणू नये. बेलाचे फूल-अंजनासाठी उपयोगी. बेलाचे कोवळे फळ वापरावे. ते संग्राहि, दीपन, कफवातप्रशमन यात श्रेष्ठ आहे. पक्व बेलफळ वापरू नये. ते पचावयास जड आहे. दोष वाढविणारे आहे. अणुतेलात हे द्रव्य आहे. कफपित्तातिसाराच्या पेयेत उपयुक्त. फुलांचे अंजन उपयुक्त. **मूळ**—गोड, त्रिदोषज, वांती, शूल, कष्टाने लघ्वी होणे हे विकार नाशक. कच्चे **बेलफळ**—गोड, आंबट, तुरट, जड, हृदयास हितकर, कफज्वर व व अतिसार नाशक, रुचिकर व अतिशय अग्निदीपक.

**(बिल्वी)**—स्त्री., वनस्पति० हिङ्गुपत्री (रा. ६.६२)
बाफळी.

**–क्षार**—पु., योग० बिल्वफलदहनेन कृतः क्षारः उदरे उपयुक्तः (चचि. १३.१७०)
बेलफळ जाळून केलेला क्षार. उदरावर उपयुक्त.

**–गन्धक**—पु., वनस्पति० अर्जकः (ध. ४.५४)
अजवला.

**–ज**—न., बिल्वफलम् (सुचि. ३८.४८) बेलफळ.

**–तैल**—न., तैल० बिल्वादिसिद्धं तैलम् (चसि. ७.५३) वाते बिल्वतैलानुवासनमुपयुक्तम् (चसि. ३.७०) बिल्वमूलमधुयष्टीमदनफलक्वाथसिद्धं तैलम् (सुचि. ३७.४६)
बेल घालून सिद्ध केलेले तेल. बिल्वतेल. बेलमूळ, ज्येष्ठमध, गेळफळ, यांच्या काढ्याने तेल सिद्ध करावे.

**–पर्णी**—स्त्री., शाक० बिल्वार्जकम् इदं कफं नाशयति (चसू. २७.१०७) एक भाजी. कफनाशक.

**–पत्र**—न., शाक० इदं वातं नाशयति (चसू. २७.१०७)
बेलाची पाने. यांची भाजी वातशामक.

**–पेशिका**—स्त्री., बिल्वमज्जा (अहृसू. १५.३८) बालबिल्वगिरः (ड. सुचि. ५.७; सुसू. ३८.४६)
बिल्वमज्जा, बेलफळातील गर.

**–फल**—न., बिल्ववृक्षस्य फलम् द्र० 'बिल्व' (सुसू. ४६.१७४) बेलफळ.

**–मात्र**—वि., पलमात्रम् (अहृसू. २४.१७)
चार तोळे.

**–मूल**—न., बिल्ववृक्षस्य मूलम् (असंउ. ४७; अहृसू. ६.१६७) द्र० 'बिल्व'
बिल्व वृक्षाचे मूळ.

**–शलाटु**—न., कोमलबिल्वफलम् (सुउ. ४०.४४; असंशा. ४.२३) द्र० 'बिल्व' कोवळे बेलफळ.

**–शाक**—न., शाक० बिल्वशाकम्, सामान्यगुणाः–मधुरं तिक्तं उष्णं वातप्रशमनं च (सुसू. ४६.२५४)
बेलाची भाजी. गोड, कडु, उष्ण, वातनाशक.

**बिल्वादिगण**—पु., बृहत्पञ्चमूलम्, गणेऽस्मिन् बिल्व; अग्निमन्थः, श्योनाकः काश्मरी, पाटला चेति द्रव्याणि (सुचि. ८.१३)
बृहत्पंचमूळे. बेल, अरणी, टेंटू, शिवण, पहाड यांची मुळे ती मोठी पंचमूळे.

**बिल्वान्तर**—पु., वनस्पति० चीरवृक्षो, दीर्घमूलो, वीरवृक्षः, कृच्छ्रारिः, क्षुधाकुशलसंज्ञकः इति अस्य स्वरूपगुणबोधकानि नामानि, गुणाः– कटूष्णः, कृच्छ्रघ्नः, संधिशूलघ्नृत् वह्निदीप्तिकरः, पथ्यो, वातामयविनाशनः (रापरि. ८.३०-३१)
लांब मुळांचा, सालींची वल्कले होऊ शकणारा वृक्ष. बिल्वांतराचे **गुण**–– तिखट, उष्ण, मूत्रकृच्छ्र विकार बरे करणारा, संधिशूल नाशक, अग्नि प्रदीप्त करणारा, पथ्य, वातामय नाशक आहे.

**बिल्विका**—स्त्री., वनस्पति० हिङ्गुपत्री (ध. २.३८)
हिंगुपत्री. बाफळी.

**बिस**—न., वनस्पति० कमलनालम्, गुरुप्रकृतित्वान्नाभ्यसेत् (चसू. ५.१०) कमलतन्तुः (चचि. १४.९; सुचि. २८.१३) मृणालसूत्रम् (चचि. ३.२५८) पद्ममूलम्, प्रमेहे शृङ्गाटकादिगणे (सुचि. ११.१०; सुसू. ४६.३०३) भिषण्डकं, बिसाण्डकं वा (सुसू. ४६.४६४; सुसू. ५४.४) स्थूलपद्मनालं बिसमाहुः। कन्दशाकस्य गुणाः–अविदाहि, रक्तपित्तप्रसादनं, विष्टम्भि, दुर्जरं, रूक्षं, विरसं, मारुतापहं च (सुसू. ४६.३०३) मधुरं, वातकोपनं च (ध. ४.१६२) तिक्तं, कषायं, शिशिरं,

**पित्तदाहजित्, मूत्रकृच्छ्रविकारघ्नं, रक्तवान्तिहरं** ( रा. १०.२५८ )
हिं.—कमलकी नाल, कमलकी डंडी.
**म.—कमळाचा देठ.**
बं.—पद्मेरंडाटा.
कमळाचा देठ. कमळातील तंतु, कमलमूळ. स्थूल नालाला बिस आणि सूक्ष्म तंतूला मृणाल म्हणतात. भिरुंडक, बिसांडक अशी नावेही वेगवेगळ्या काळी प्रसिद्ध होती.
कमळाचा देठ स्वभावतःच जड असल्यामुळे खाऊ नये. कमळाचे मूळ प्रमेहचिकित्सेमध्ये शृंगाटक गणामध्ये सांगितले आहे. कमळकंदाची भाजी करतात. त्या कंदाचे **गुण**—जळजळ न करणारा रक्तपित्तप्रसादक, मलावष्टंभक, पचावयास कठीण, रूक्ष, रसहीन, वातनाशक, कडू, तुरट, थंड, पित्तदाह नाशक. मूत्रकृच्छ्र व रक्ताची वांती थांबविते.

**–कुसुम**–न., वनस्पति० **रक्तपद्मम्** ( रा. १०.२४४ )
तांबडे कमळ.

**–ग्रन्थि**–स्त्री., **पद्ममूलं, कलुषजलस्य प्रसादनं** ( सुसू. ४५.१७ )
पद्मकाष्ठमूळ. याने पाणी शुद्ध होते.

**–वर्त्मन्**–न., नेत्ररोग० **यद् वर्त्म बहुभिः सूक्ष्मच्छिद्रैर्युक्तं शूनं अन्तरुदकं बिसतुल्यं च तद् बिसवर्त्म** ( सुसू, ३.२८ ) **साध्यो नेत्ररोग०** ( सुउ. १.४२; असंउ. ११ ) **तत्र चिकित्सा–पक्वं बिसग्रन्थिं स्वेदयित्वाऽनन्तरमस्य पक्वस्य बिसग्रन्थे च्छिद्राणि निराश्रयं भित्त्वा सैन्धवेन कासीसादियुक्तेनावचूर्णयेत् प्रतिसारयेद्वा, अनन्तरं संधानार्थं मधुघृतं दत्वा सम्यग्बंधमाचरेत्** ( सुउ. १४.३-४ )
नेत्ररोगाचे नांव. डोळ्याच्या पापणीत पुष्कळ सूक्ष्म छिद्रांनी युक्त अशी सूज. तिच्या आत पाणी असून कमळाच्या तंतूसारखी ती असते. **उपचार**–पिकलेली गाठ शेकून ती छिद्रे मुळासह खरडून त्यावर हिराकस इत्यादी औषधीयुक्त सैंधव लावावा. नंतर मध व तूप लावून डोळा बांधावा. जखम भरेल.

**बिसिनी**–स्त्री., वनस्पति० **बिसम्** ( ध. ४.१६१ )
कमळाचा देठ. नाळ, केशर.

**बीज**–न., **प्रभवकारणम्, मूलकारणम्, मूलसूत्रम्, संभवहेतुः** ( चशा. २.३३; सुउ. १८.८३; सुउ. ९.२५; सुसू. १.३९ )
जन्माचे कारण. बी. मूळकारण. मूळचे सूत्र.
**शुक्रशोणितम्** ( चशा. ३.१७; चचि. ३०.१२६; चशा. २.१८; र. १२.१; सुशा. २.३८; असंशा. २.५१; कासि. २; काशा. )
मानवबीज. शुक्र आणि शोणित यांतील बीज. पुरुषशुक्र व स्त्रीशुक्र यांतील बीज.
**ग्रासजारणार्थं दीयमानं शुद्धं सुवर्णं रूप्यं च** ( र. ८.७४ ) **विशिष्टेन निर्वापणेन तत्तद्वर्णं मृदुलं चित्रसंस्कारकरणसमर्थं च जातं लोहम्** ( र. ८.३१ ) **चतुष्षष्टि महाबीजानां साधारणानां सर्वबीजानामेकतमम्** ( र. २८.१२-१४ )
पारदाला ग्रास–घास घेण्यासाठी दिले जाणारे शुद्ध सोने व रुपे. विशिष्ट तऱ्हेच्या पाण्यात विझवल्याने योग्य रंगाचे मऊ व अनेक निरनिराळे संस्कार करण्यास योग्य असलेला धातु. चौसष्ट महाबीजां–पैकी एक.
**वनस्पति० जेपालः** ( ध. १.२२८ )
जयपाळ.
**पुष्करमूलम्** ( रा. ६.९२ ) पोखरमूळ.

**–कण्ठ**–पु., **यत्र बीजानि बद्धानि सन्ति स बीजकण्ठः फलसम्बद्धः** ( चक. ४.८ )
ज्या ठिकाणी फळाच्या बिया असतात तो फळाचा कंठ.

**–कर्कटिका**–स्त्री., वनस्पति० **चीनाकर्कटी** ( रा. ७.२६० ) काकडी, चिकणकाकडी.

**–गर्भ**–पु., वनस्पति० **पटोलम्** ( रा. ३.७४ )
कडू पडवळ.

**–ग्रहण**–न., **योनौ निषिक्तस्य शुक्रस्यानिःसरणम्** ( चशा. २.२३; असंशा. २.८ )
बीजाचे ग्रहण. योनीमध्ये टाकलेले शुक्र बाहेर न जाणे.

**–दोष**–पु., **शुक्रशोणितदुष्टिः** ( चचि. ३०.८; चचि. ६.५७ ) शुक्र–आर्तवदोष.

**–धर्मन्**–वि., **बीजं नाम सदृशमङ्कुरं धारयति स जीव इत्यर्थः स आत्मलीनो भूतसंतानः सदृशं देहरूपं भूतान्तरसंगं कुर्वन्बीजधर्मा भवति** ( चशा. २.३५ )
जीव. आपल्यासारखा अंकुर धारण करणारा आपल्यासारखा देह अन्य शरिराशी संभोग करून निर्माण करणारा.

**–धर्मिणी**–वि., **सत्त्वरजस्तमसां गुणानां साम्यावस्थायां**

स्थिता सर्वेषां महदादिविकाराणां बीजभावेनावस्थिता प्रकृतिः ( सुशा. १.९ )
सत्वरजतमांच्या साम्यावस्थेमध्ये महदादि विकारांची बीजे धारण करणारी ( प्रकृति ).

**–धातु**–पु., **शुक्रधातुर्गर्भबीजस्थः** ( काशा. )
शुक्रधातु. गर्भाचे बीजरूप असलेला.

**–धान्य**–न., **वनस्पति० धान्यकम्** ( रा. ६.९८ )
धने.

**–पादप**–पु., **वनस्पति० भल्लातकः** ( रा. ११.२०२ )
भिलावा.

**–पुष्पक**–पु., **धान्य० यावनालः** ( रा. १६.१६९ )
जोंधळा.

**–पूर**–पु., **वनस्पति० मातुलुङ्गम्** ( ध. ५.२२; र. २.१५८ ) महाळुंग.

**–पूरक**–न., **वनस्पति० मातुलुङ्गम्** ( सुउ. ३९.३०३ )
महाळुंग.

**–पूरकमज्जन्**–पु., **बीजपूरकफलस्य बीजस्थितमृदुद्रव्यम्, तद्गुणाः–स्वादुपाकोऽग्निबलकृत् स्निग्धः, पित्तानिलापहश्च** ( सुसू. ४६.२०७ )
महाळुंगाच्या फळाच्या बीमधले मऊ द्रव्य. **गुण**–– पचनानंतर गोड, अग्नि बलवान करणारा, स्निग्ध, पित्तवातनाशक.

**–पूर्ण**–पु., मातुलुङ्गम् ( ध. ५.२२ ) महाळुंग.

**–पोषण**–वि., **बीजं नाम शुक्रं पुष्यति अनेन बीजं वा पुष्णाति इति बीजपोषणः शुक्रवृद्धिहेतुः** ( अहसू. १.४८ ) शुक्रपोषण. शुक्रपोषक.

**–फलक**–पु., **वनस्पति० मातुलुङ्गम्** ( रा. ११.२७ )
महाळुंग.

**–भाग**–पु., **बीजस्याङ्गप्रत्यङ्गनिर्वर्तको भागः** ( चशा. ३.१७, चशा. ४.३० )
बियांचा अंगप्रत्यंग निर्माण करणारा भाग.

**–भूत**–वि. **बीजस्वरूपम् बीजान्तर्गतम्** ( असंशा. ८.७ ) बीजात राहणारे. बीजरूप.

**–रेचक**–पु., **वनस्पति० जेपालः** ( ध. १.२२७ )
जयपाळ.

**–रेचनी**–स्त्री., **वनस्पति० जेपालः** ( रा. ६.३४३ )
जयपाळ.

**–वर**–पु., **वनस्पति० राजमाषः** ( ६.८४ ) चवळी.

**–वृक्ष**–पु., **वनस्पति० असनः** ( रा. ९.२०७ )
असाणा.

**–सार**–पु., **असनसारः** ( सुचि. २५.३२; असंचि. १८ ) असाणासार, नार, गाभा.

**–साररिष्ट**–पु., **आसुत० बीजकसारत्रिफलाद्राक्षालाक्षादिभिः सिद्धोऽयं पाण्डुकामलामेहहृद्रोगवातशोणितविषमज्वरारोचककासश्वासहरः** (असंचि.१८)
असनसारारिष्ट. असाणा, नार, त्रिफळा, द्राक्षे, लाख, इत्यादीचे आसव. पांडु, कावीळ, प्रमेह, हृद्रोग, वातरक्त, विषमज्वर, अरुचि, श्वास, खोकला नाशक.

**–स्नेह**–पु., **वनस्पति० पलाशः** ( ध. ५.१६२ )
पळस.

**बीजकारिष्ट**–पु., **आसुत० बीजसारारिष्टः पाण्डुरोगादिषूपयुक्तो योगः** ( चचि. १६.१०६-११० )
असाण्याचे अरिष्ट. पांडुरोगादीसाठी उपयुक्त.

**बीजांश**–पु., **बीजभागः** ( असंशा. २.५० )
बीजाचा भाग.

**बीजान्त**–न., **वनस्पति० जेपालः** ( रा. ६.३४४ )
जयपाळ.

( **बीजान्ता** )–स्त्री., **वनस्पति० इन्द्रयवः** ( रा. ९.२२ )
इंद्रजव.

**बीजाम्ल**–न., **वनस्पति० वृक्षाम्लम्** ( रा. ६.१४४ )
चिंच, अमसूल.

**बीजावर्त**–पु., **यस्मिन्काले द्रावणकारणयोग्यं यद्द्रव्यं तन्निभा ज्वाला धमनकरणेऽग्नौ वाऽवलोक्यते स कालो बीजावर्त इत्युच्यते। अस्मिन्नेव काले द्रावस्योन्मुखता ज्ञेया। संप्रति सद्यो वा द्रुतिर्भाविनीति भावः** ( र. ८.५९ )
धातूचा द्रव करीत असतांना त्या धातूच्या रंगाची ज्वाला जेव्हा निर्माण होते ती अवस्था धातूचा द्रव होण्याची असते. त्या स्थितीला बीजावर्त म्हणतात.

**बीजाढ्य**–पु., **वनस्पति० असनः** ( र. १७.५२ ) असाणा.

**बीजोग्र**–पु., **वनस्पति० वंशः** ( असंउ. ८ ) बांबू.

**बीजोपघात**–पु., **बीजस्य विकृतिः** ( चसू. १९.४ (५) )
बीजाची विकृति.

बीजकम् पु., **वनस्पति०** (ध. ५.२२) **मातुलुङ्गम्**
महाळुंग.

**सर्जकः** ( सुचि. ६.१९ ) राळ.

**मूढगर्भ, द्र० ' मूढगर्भ '** ( सुनि. ८.४ ) मूढगर्भ.

**वनस्पति० असनः** ( ध, ५.१२५; र. १७.३६; चचि. १६.१०६; सुचि. २७.१२; सुउ. ५८.४७ )
असाणा.

**बीजिन्**–वि., बीजमस्यास्तीति सः, वृक्षादिरूपः ( सुसू. ३६.१२ )
ज्याला बीज आहे तो. वृक्ष इत्यादि.

**बीभत्स**–वि., विकृताकृतिः ( सुचि. ३३.७ ) जुगुप्सितम् ( चचि. २०.१८ ) पूयामेध्यादि घृणाकरम् (सुउ. ४९.५) किळसवाणे. बीभत्स–भेसूर.

**–चेष्ट**–वि., लक्षण० फेनवमनाङ्गविक्षेपणादिका बीभत्सचेष्टाः यस्मिन् तथाविधः ( अपस्मारः ) ( चचि. १०.३; चनि. ८.५ )
भेसूरक्रिया–हावभाव. तोंडातून फेस येणे, हातपाय वेडेवाकडे होणे इ० लक्षणे होणारा ( अपस्मार ).

**–त्व**–न., लक्षण० दर्शनायोग्यत्वम् ( चनि. ७.७ (३) बघवत नाही असे भेसूर, भेसूरपणा, पाहाण्यास अयोग्य.

**बुक**–पु., वनस्पति० वसुकः ( ध. ४.१९ ) रुई, मांदार.

**बुक्क**–पु., हृत्प्रदेशो वक्षःप्रदेशो वा मेदोवहस्रोतसो मूलम् ( चवि., ५.८ सुनि. ९.२१ )
हृदय किंवा उरोदेश. मेदोवह स्रोतसांचे मूळ.

**बुद्धमुनि**–पु., प्राचीनो रसाचार्यः ( र. २०.१०७ )
रसाचार्य बुद्धमुनि.

**बुद्धि**–स्त्री., निश्चयात्मिका धीः कर्मपुरुषस्य गुणेष्वेकः ( सुशा. १.१७ ) तत्कालविषया एकः सात्विकगुणः ( सुशा. १.१८ ) निश्चयात्मकं ज्ञानम् (चसू. १३.४३ ) ज्ञानम् ( चसू. १.४९ ) प्रज्ञा ( चसू. १.५४ )
तात्कालिक ज्ञान. निश्चित ज्ञान. निश्चयात्मक ज्ञान. पुरुषाचा एक गुण. सात्विक गुण.

**–कर**–वि., बुद्धिवर्धकम् ( अहसू. १४.२८ )
ज्ञानवर्धक.

**–निरोध**–पु., ( परिव० ) विषयग्रहणे बुद्धेरसामर्थ्यं प्रतिहतिरूपम्, तामसगुणो हि सः (सुशा. १.१८)
ज्ञान घेण्यास असमर्थ. हे तमोगुणाचे दर्शक आहे.

**–प्रणाश**–पु., लक्षण० बुद्धेर्विनाशः (असंसू. ५.३३)
बुद्धीचा नाश.

**–प्रबोधन**–वि., बुद्धेः प्रबोधनं करोति इति। यावन्मात्रा यस्य शेमुषी नाम बुद्धिः सा तस्य स्फुटप्रतिभासा तद्योगाद्भवतीत्यर्थः ( अहसू. ५.१ )
बुद्धीला जागृत करणारे, चालना देणारे द्रव्य ( पाणी ).

**–प्रसाद**–पु., लक्षण० बुद्धेर्निर्मलत्वम्, बुद्धेः स्फुटं यथावद्विषयग्रहणे अकालुष्यम् । मनःशुद्धौ बुद्धिप्रसादः ( सुचि. ३३.२७ )
कोणत्याही विषयाचे यथायोग्य आकलन होण्यात बुद्धीची गति कुंठित नसणे. मन शुद्ध असले तरच बुद्धि प्रसन्न असू शकते.

**–मत्**–वि., उहापोहोपलक्षितधीमान् ( सुउ. २४.४२ )
बुद्धिमान. उहापोह करण्याचे कौशल्य असलेला ( वैद्य ).

**–मेधाकरगण**–पु., बुद्धिमेधावर्धकपदार्थानां समूहः, सतताध्ययनं, वादः, परतन्त्रावलोकनं, तद्विद्याचार्यसेवा चेति बुद्धिमेधाकरो गणः ( सुचि. २८.२७ )
बुद्धिमेधावर्धक पदार्थांचा समूह. नेहमी अध्ययन, वादविवाद, दुसऱ्या शास्त्रांचे अवलोकन, तज्ज्ञांची सेवा, हा बुद्धिमेधाकर गण होय.

**–विपर्यय**–पु., लक्षण० सम्मोहः ( सुशा. ६.३६ )
बुद्धीचा विपर्यय. विकृत ज्ञान. मूर्च्छाप्रधान मर्मांना आघात झाल्याचे सामान्य लक्षण.

**–विभ्रंश**–पु., लक्षण० बुद्धिभ्रष्टत्वम्, नित्यानित्ये हिताहिते यो विषमाभिनिवेशः सः बुद्धिविभ्रंश इति ज्ञेयः, समं बुद्धिर्हि पश्यति। उचिता बुद्धिः समं यथाभूतं पश्यति ( चक्र. चशा. १.९९ )
बुद्धीचा भ्रंश. बुद्धि सम–जसे असेल तसे पहाते. नित्य अनित्य, हित अहित या बाबतीत विपरीत ज्ञान होणे बुद्धीचा विभ्रंश होय.

**–शुद्धि**–स्त्री., लक्षण० बुद्धेः निश्चयात्मकज्ञानकरत्वे पाटवम् ( चसू. १६.६ )
बुद्धीने निश्चयात्मक ज्ञान करण्याचे सामर्थ्य. बुद्धीची शुद्धि.

**–साम्य**–न., प्रस्तावविशेषे समानज्ञानम् ( चवि. ८.३४ ) सर्व सामान्य ज्ञान.

**बुद्धीन्द्रिय**–न., ज्ञानेन्द्रियम् ( सुशा. १.४ ) पञ्च बुद्धीन्द्रियाणि, तद्यथा–स्पर्शनं, रसनं, घ्राणं, दर्शनं, श्रोत्रं चेति ( चशा. ७.७ )
स्पर्श, रस, वास, दृष्टी आणि श्रवण यांची इंद्रिये. हीच बुद्धींद्रिये होत.

**बुद्धीन्द्रियोपरोध**–पु., लक्षण० बुद्धेरिन्द्रियाणां रोधः ( चचि. ४.२७. ) ज्ञानेंद्रियांचा रोध.

**बुद्ध्युपघात**–पु., लक्षण० बुद्धेर्विनाशः ( चसू. ८.१५ )
बुद्धीचा नाश.

**बुद्बुद**–पु., वायुना अन्तःपूरितो जलादिद्रवबिन्दुः ( अहृसू. ७.६ )
बुडबुडा. वायु भरलेला जल इ० चा थेंब.
शारीर० **अक्षिगोलकम्** ( सुउ. १.१० ) द्र० **'नेत्र'** डोळ्याचा गोल.
न., **नेत्ररोग० अहिताचारहेतुको व्यधदोषभवो वा रोगः** ( सुउ. १७.८५-८६ )
डोळ्याच्या वेध, या शस्त्रकर्मात चूक झाल्यास बुड-बुड्याच्या आकाराचे मांस बाहेर येते तो रोग.

**बुधरत्न**–न., **रत्न० मरकतम्** ( ध. ६.४९ )
बुधग्रहाचे रत्न. पांच,पाचू.

**बुभुक्षा**–स्त्री., **भोक्तुमिच्छा** ( सुचि. ३४.४ )
खाण्याची इच्छा. भूक.

**बुभुक्षित**–वि., **क्षुधायुक्तः** ( का. भोजनकल्प. ११ )
भुकेलेला.

**बुस**–न,, **कणकं, तुषम्, धान्यपलालम्** ( चइ. १२.१९; सुचि. ३२.११ ) कोंडा. भूस.

**बुसोषित**–वि., **बुसमध्ये स्थितम् ( अरिष्टादि )** ( सुउ. ४२.४८ )
कोंड्यात ठेवलेले पदार्थ. ( अरिष्ट इ० )

**बूक**–पु., **वनस्पति० वसुकः ईश्वरमल्लिका** ( अरुणदत्त )
थोर बकुळी.
**बकपुष्पः** ( हेमाद्रि ) ( अहृसू. १५.२४ ) हदगा.

**बृंहण**–वि., न., उपक्रम० ( चसू. २२.४२ ) **धातुपुष्टिकरं शरीरवृद्धिकरं देहोपचयकरं वा** (सुसू. ४५.११२; सुसू. ३८.३६; सुचि. १.८; चसू. २६.४३. (१) ) **बृंहणं यद्देहस्य बृहत्त्वाय भवति। प्रायः बृंहणं द्रव्यं भूम्युदकात्मकम्** ( असंसू. २४.४; असंसू. १७.८ ) **प्रायो बृंहणं द्रव्यं गुरु, शीतं, मृदु, स्निग्धं, बहलं, स्थूलपिच्छिलं, मन्दं, स्थिरं, श्लक्ष्णं च** (चसू.२२.१०) **सन्तर्पणापरपर्यायः बृंहणयोग्या नराः व्याधिभैषज्यमद्यस्त्रीशोककर्शितान्, भाराध्वोरःक्षतक्षीणरूक्षदुर्बलवातलान्, गर्भिणीसूतिकाबालवृद्धान् ग्रीष्मेऽपरानपि बृंहयेत्** ( अहृसू. १४.८ ) **बृंहणद्रव्याणि—मांसक्षीरसितासर्पिर्मधुरस्निग्धबस्तयः, तथैव स्वप्नशय्यासुखाऽभ्यङ्गस्नाननिर्वृतिहर्षणानि** ( अहृसू. १४.९-३४ ) **सामान्येन मधुरो रसः बृंहणः** ( चसू. २६.४३ (१) )
**बृंहण**– धातुपुष्टि करणारे, शरीरवाढ करणारे, दोषांचे सम्यग पचन करून देह सुदृढ बनविणारे द्रव्य. बृंहण द्रव्य बहुधा पृथ्वी आणि आप ह्या महाभूतांनी युक्त असते. त्याचे **गुण**— पचनास जड, वीर्याने थंड, मृदु, स्निग्ध, पुष्कळ घट्ट, बुळबुळीत, मंद, स्थिर आणि गुळगुळीत अशा द्रव्याला संतर्पण म्हणतात. निरनिराळे रोग, औषधे मद्य, स्त्रीसेवा. शोक यांनी जे रोड झाले आहेत किंवा वजन उचलणे, मार्ग चालणे, उरःक्षतजन्य क्षीणत्व, रुक्षत्व किंवा दुर्बलत्व आणि वात-विकाराने पीडित आहेत, गर्भिणी, बाळंतिणी, बाल आणि वृद्ध यांना निरोगी अवस्थेतहि व इतरांना सर्वांना ग्रीष्म ऋतूत हे द्यावे. या बृंहणासाठी मांस, क्षीर, खडीसाखर, तूप, मधुरद्रव्ये, स्निग्ध बस्ती, तसेच झोप, शय्यासुख, अभ्यंग, स्नान, आराम, आनंद इत्यादींची आवश्यकता असते. सामान्यतः मधुर रस हा बृंहण करणारा आहे.

**–बस्ति**–पु., **उपक्रम० बृंहणद्रव्यनिःक्वाथास्तत्कल्कस्नेहसैन्धवैः युक्ताः खजप्रमथिता बस्तयो बृंहणा मताः** ( सुसू. १५.३३ ) द्र० **'बस्ति'**
पुष्टि निर्माण करणाऱ्या द्रव्यांचा काढा, त्यांची चटणी, स्नेह व सैंधव घालून रवीने घुसळून तयार झाल्यावर दिलेला बस्ति पौष्टिक होतो.

**–रोगिन्**–पु., **यस्य बृंहणं शस्तं, स रुग्णः** ( असंसू. २४.४२ ) द्र० **'बृंहण'**
ज्याला पौष्टिक द्रव्य देणे जरूर आहे असा रोगी.

**बृंहणीय**–वि., ( चसू. ४.८ )
बृंहणाला जे हितकारक.
**द्रव्यगण०–महाषट्के महाकषायवर्गे एको गणः क्षीरिणीराजक्षवकाऽश्वगन्धाकाकोलीक्षीरकाकोलीवाट्यायनीभद्रोदनीभारद्वाजीपयस्यर्ष्यगन्धा इति दशेमानि बृंहणीयानि भवन्ति** ( चसू. ४.९; असंसू. १५.७; सुउ. ५८.५९ )
मोठी दुधी, लहान दुधी, आस्कंद, कावळी, दुधीकावळी, पांढरा चिकणा, पिवळा चिकणा, रानकापशी, भुईकोहळा, वरधारा किंवा अतिबला ह्या दहा औषधांचा बृंहणीय द्रव्यगण.

**बृंहित**–वि., **बृंहणोपक्रमेण चिकित्सितः** (अहृसू. १४.१६)
ज्याला बृंहण उपचार केले आहेत असा.

**–लक्षण**–न., **बृंहितस्य लक्षणम्। बृंहिते सति बलं, पुष्टिस्तत्साध्यामयसङ्क्षयश्च** ( असंसू. २४.१६ )
बृंहण झाल्याचे लक्षण. बल, पुष्टि व बृंहणाने बरे होणारे रोग नष्ट होणे.

**बृंह्य**–वि., बृंहणार्हः, कर्तव्यबृंहणविधिकः, बृंहणयोग्यः इति ( असंसू. २४.१०-१२ )
बृंहणाला सुयोग्य.

**बृहत्**–वि., महत् ( रापरि. ७.४० )
उपचितम् ( अहसू. १४.२ ) मोठा. पुष्ट.

**–कन्द**–पु., वनस्पति० विष्णुकन्दः ( रापरि. ७.४० )
पाण्यात होणारा मोठा लंब गोल व पापुद्रे असलेला कंद. त्याला विष्णुकंद म्हणतात.

**–कोशातकी**–स्त्री., वनस्पति० कोशातकी ( रा. ७.२८४ )
दोडक्याचा एक प्रकार. मोठे दोडके.

**–ताल**–पु., वनस्पति० हिन्तालः ( रा. ९.९८ )
मोठा ताड.

**–तिक्ता**–स्त्री., वनस्पति० पाठा ( ध. १.७० )
पहाडमूळ.

**–त्व**–न., बृहतो भावः, महत्वम् ( असंसू. ७.९९ )
मोठेपण.

**–त्वच्**–स्त्री., वनस्पति० सप्तपर्णः ( रा. १२.१३९ )
सातवीण.

**–पत्र**–पु., वनस्पति० हस्तिकन्दः ( रापरि. ७.३५ )
हत्तीकंद; भुईकोहोळ्या सारखा डुकरकंदासारखा फार मोठा कंद.
लोध्रः ( चक. ९.३ ) लोध्र.

**–पत्री**–स्त्री., वनस्पति० तिलकन्दः ( रापरि. ७.५३ )
कण्हेरीच्या पानासारखी मोठी ३।३ पाने येणारी, अति मोठा आणि फुटलेल्या गाठींनी युक्त असा स्निग्ध कंद, जमिनीत खोल असलेली वेल. हिच्या कंदाला तिलकंद म्हणतात. या कंदावर तिळासारखे ठिपके असतात.

**–पर्ण**–पु., लोध्रः ( ध. ३.१७७ ) लोध्र.

**–पारेवत**–न., वनस्पति० पारेवतम् ( रा. ११.९० )
खजूर.

**–पाली**–स्त्री., वनस्पति० जीरक० ( ध.२.७२ ) जिरे.

**–पीलु**–पु., वनस्पति० पीलुभेदः (रा.११.६३) पीलु.

**–पुष्पा**–स्त्री., वनस्पति० कुब्जकः ( ध. ५.१४६ )
काटेशेवंती.

**–पुष्पी**–स्त्री., वनस्पति० शणपुष्पी ( ध. १.२०० )
रानताग.

**–फला**–स्त्री., वनस्पति० कूष्माण्डम् ( ध. १.१८३ )
कोहळा.

इन्द्रवारुणी ( रा. ३.३७६ ) इंद्रावण.
जम्बूभेदः ( रा. ११.१३० ) द्र० ‘ जम्बू ’ जांभळाचा प्रकार.
महाबला ( ध. १. २८२ ) मोठी बला.
कटुतुम्बी ( रा. ३.२३४ ) मोठा कडु भोपळा.

**–सरोरुह**–न., बृहत्कमलम् ( चक. १.१९ )
मोठे कमळ.

**( बृहच् )–चञ्चु**–स्त्री., वनस्पति० गुणाः–कटुः, कषाया, उष्णा, मलरोधनी, रसायनी, गुल्मशूलोदरार्शोर्तिविषघ्नी ( रा. परि. ४.२२ )
चंचु. लांब पानाची, अति प्रसन्न वासाची वनस्पती.
**गुण**—तिखट, तुरट, उष्ण, मलावरोधकारक, रसादिधातु वाढवणारी, गुल्म, शूल, उदर, मूळव्याध आणि विषनाशक.

**–छद**–पु., वनस्पति० अक्षोटः ( रा. ११.८२ )
आक्रोड.

**–छिम्बी**–स्त्री., वनस्पति० असिशिम्बी (रापरि. ७.९७)
तरवारीसारख्या जाड व लांब शेंगा येणारा वृक्ष.

**–छुक**–पु., प्रतुदपक्षि० ( धपरि. ६.१२ ) द्र० ‘ प्रतुद. ’ भक्ष्याला टोचून खाणारा पक्षी.

**( बृहज् )–जीवन्ती**–स्त्री., वनस्पति० जीवन्तीभेदः ( रा. ३.१७९ ) द्र० ‘जीवन्ती ’ एक हरिणदोडी.

**–जीवा**–स्त्री., वनस्पति० जीवन्ती ( रा. ३.१७९ )
गुळवेल, हिरडा, हरिणदोडी.

**( बृहद् )–दल**–पु., वनस्पति० हिन्तालः ( रा. ९.९७ )
शिंदी.
लोध्रभेदः ( रा. ६.२४० ) द्र० ‘लोध्र ’ लोध्र.

**–वल्क**–पु., वनस्पति० लोध्रभेदः ( रा. ६.२४० )
लोध्रप्रकार.

**–वारुणी**–स्त्री., वनस्पति० इन्द्रवारुणी (रा. ३.३७६)
इंद्रावण, कडु इंद्रावण.

**बृहती**–स्त्री., वनस्पति० बृहत्पञ्चमूले, श्वयथुहरगणे, हिक्कानिग्रहगणे, महाकषायवर्गे, कण्ठ्यगणे, अङ्गमर्दप्रशमनगणे चैकं द्रव्यम् ( चसू. ४.१७ ) अणुतैलद्रव्येष्वेकं द्रव्यम् ( चसू. ५.६५ ) आमलकीफलाकारफला क्षुद्रवार्ताकः व्रणशोधनतैले उपयुज्यते ( सुसू. ३७.१८ ) अस्याः पुष्पाणि अञ्जने उपयुज्यन्ते ( सुउ. १२.११ ) बृहत्यौ वा बृहतीद्वयमित्यनेन कण्टकारी बृहती चेति वनस्पतिद्वयं गृह्यते । विदारीगन्धादिगणे ( सुसू. ३८.४ )

गर्भिण्यवस्थायां गर्भस्रावपरिहारार्थमुपयुज्यते (सुशा. १०.६१) शूलहरकार्थे उपयुज्यते (सुउ. ४२.१२८) बृहती द्विधा–सिंही व्याघ्री च (अहसू. ६.७६) बृहत्यादिगणे उल्लिखितं बृहतीद्वयम् बृहती कण्टकारिका च (सुसू. ३८.३१) गुणाः– कफवातघ्नी, श्वासशूलज्वरापहा, छर्दिहृद्रोगमन्दाग्न्यामदोषनाशनी च, सोष्णा पाचनी च (ध. १.९४) कटुतिक्ता, कासघ्नी, अरोचकश्वासहृद्रोगहारिणी च (रा. ४.१२२)

हिं.—बान्हंटा, बिर्हांटा.

**म.—डोरली, मोतीरिंगणी.**

गु.—उभी रिंगणी.

बं.—व्याकुरा.

त.—करीमुल्हि, पप्परामुल्हि.

डोरली. मोतीरिंगणी. बृहत्पंचमूलामधील एक औषध. सूज-हिक्कानाशकगणातील एक औषध. महाकषाय, कंठ्य. अंगमर्दनप्रशमनगणातील एक औषध. अणुतैलातील द्रव्यापैकी एक द्रव्य. आवळ्याच्या फळासारखा आकार असतो. डोरले वांगे किंवा क्षुद्र वांगे असेही याला नाव आहे. व्रणशोधनासाठी करावयाच्या तेलात याचा उपयोग होतो. बृहतीद्वय शब्दाने काटेरिंगणी व डोरली ह्या दोहींचा बोध होतो. विदारीगंधादिगणात हे द्रव्य आहे. खोकला अरुची, हृद्रोग नाशकही आहे. बृहतीद्वय असे म्हणतांना काटेरिंगणी, डोरली असे समजावे. यांच्या फुलांचा अंजनात उपयोग करावा. बृहतीचे **गुण**—कफवातनाशक, श्वास, शूल, ज्वर नाशक, ओकारी, हृदयरोग नाशक; मंदाग्निनाशक, आमदोषनाशक आहेत. गर्भस्रावनाशक शूलहर आहे.

**–द्वय**–न., **वनस्पति० बृहती कण्टकारी च** (सुसू. ३८.६६; असंसू. ७.)

डोरली आणि रिंगणी.

**–फल**–न., **बृहतीद्वयस्य फलम् फलशाकविशेषः, तच्च कटु, तिक्तं, लघु, वातकफहरं, कण्डू-कुष्ठ-कृमिघ्नं च** (सुसू. ४६.२६७)

रिंगणी डोरलीची फळे. फळभाजी–तिखट, कडु, हलकी, वातकफहर, कृमि, कुष्ठ, कंडूनाशक.

**–मर्मन्**–न., **शारीर० पृष्ठमर्म, स्तनमूलादृजूभयतः पृष्ठवंशस्य बृहत्यौ नाम मर्मणी, तत्र विद्धे सति शोणितातिप्रवृत्तिनिमित्तैरुपद्रवैर्म्रियते, सिरामर्मणी अर्धांगुले, कालान्तरप्राणहरे च** (सुशा. ६.२६)

बृहती नावाची दोन मर्मे. स्तनमूलांच्या पासून पाठीकडे जाणाऱ्या भागात आहेत. यावरील आघाताने रक्ताचा अतिस्राव व तज्जन्य उपद्रव होऊन मरतो. मर्मांचे प्रमाण–अर्धा अंगुळ. ७ दिवसानंतर मारक.

**बृहत्यादिगण**–पु., **सन्निपातज्वरापहो गणः, बृहत्यौ–पौष्करं, भार्ङ्गी, शटी, शृङ्गी, दुरालभा, वत्सकस्य बीजानि, पटोलं, कटुरोहिणी च, अयं बृहत्यादिगणः सन्निपातज्वरापहः तथैव सोपद्रवेषु सर्वेषु कासादिषु दातव्यः** (चचि. ३.२१३-२१४) **बृहती, कण्टकारिका, कुटजफलं, पाठां मधुकं चेति, अयं बृहत्यादिगणः पाचनीयः, पित्तानिलापहकफारोचकहृद्रोगमूत्रकृच्छ्ररुजापहः** (सुसू. ३८.३१-३२)

बृहत्यादिगण. सन्निपातज्वरनाशक गण. यामध्ये रिंगणी, डोरली, पुष्कुरमूळ, भारंगमूळ, कचोरा, मेषशृंगी, धमासा, इंद्रजव, कडुपडवळ, कुटकी ही औषधे आहेत. या गणाने सान्निपातिकज्वर उपद्रवांसह सर्व तऱ्हेच्या कासावर योजला जातो. आणखी एक बृहतीगण आहे त्यामध्ये डोरली, रिंगणी, इंद्रजव, पहाडमूळ, ज्येष्ठमध अशी औषधे येतात. तो गण पाचक पित्तवातनाशक, कफ, अरुचि, हृद्रोग, मूत्रकृच्छ्र नाशक आहे.

**बृहदेला**–स्त्री., **एलाभेदः** (ध. २.४६) **द्र० 'एला'**

मोठा वेलदोडा.

**बृहस्पति**–पु., **ऋषि० विषहरयोगप्रणेता कश्चिद् ऋषिः** (असंसू. ८.१०२)

विषनाशक प्रयोगाचे प्रणेते बृहस्पती नावाचे ऋषि.

**बैजवापि**–पु., **ऋषि० बीजवापस्य अपत्यं पुमानिति बैजवापिः रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः** (चसू. १.११)

बीजवापाचा मुलगा बैजवापि नांवाचा ऋषि. रोगांचा नाश करण्याच्या उपायांचा विचार करण्यासाठी हिमालयाच्या उतरणीवर जमलेल्या ऋषींपैकी एक.

**बैडाल**–वि., (सुउ. ३९.२६३)

बिडालाचे ते बैडाल. बिडालाची विष्ठा, जवादी मांजराची विष्ठा.

**बैभीतक**–वि., **विभीतकसम्बन्धि (तैलादि)** (सुचि. ९.१७) बेहेड्याचे. (तेल इत्यादी).

**-तैल**-न., बिभीतकमज्जायास्तैलं बिभीतकफलोत्थतैलं वा ( सुचि. ९.१७ )
बेहेड्याच्या बीमधील मगजाचे तेल.

**-मज्जा**-स्त्री., बिभीतकस्य मज्जा, तद्गुणाः-मदकरः कफमारुतनाशनः ( सुसू. ४६.२०५ )
बेहेड्याच्या बीतील मगज. **गुण—** माज आणणारे, कफ वात नाशक.

**-रस**-पु., बिभीतकस्य रसः ( चक. १२.१५ )
बेहेड्याचा रस.

**बैभीतकीसुरा**-स्त्री., आसुत० बिभीतकवल्कलयुक्तशालिपिष्टकृता सुरा, नातितीव्रमदा, लघ्वी, पथ्या च। व्रणे पाण्डुरोगे कुष्ठे चोपयोक्तव्या ( अहसू. ५.६९ )
बेहेड्याची दारु. थोडा माज आणणारी ,हलकी, पथ्यकर, व्रण, पांडुरोग व कुष्टात उपयोगी.

**बैल**-पु., बिलेशयप्राणिविशेषः, बिले निवसति इति बैलः बिलेशयः ( चसू. २४.७; चचि. १८.१८५; असंचि. ४ )
बिळात राहाणारे ते बैल प्राणी. साप, उंदीर वगैरे.

**बैल्व**-वि., बिल्वस्येदमिति बैल्वं नाम बिल्वसम्बन्धि, यथा बैल्वकाष्ठं नाम बिल्वस्य काष्ठम् ( चशा. ८.३३ ) बेलाचे-बेलाचे लाकूड.

**बोकडी**-स्त्री., वनस्पति० बस्तान्त्रिः ( रा. ३.२ )
बोकडी. एक वनस्पती.

**बोट**-न., वनस्पति० शालिपर्णीभेदः ( ध. १.८९; असंचि. ५ ) द्र० ' शालिपर्णी ' सालवणप्रकार.

**बोदारशृङ्गक**-न., खनिज० मृद्दारशृङ्गकम्. सदलं पीतवर्णं च गुर्जरमण्डले भवेत्। अर्बुदस्य गिरेः पार्श्वे बोदारशृङ्गकं जातम्, गुणाः-शीतं, वातश्लेष्मशमनं पुंस्त्वदायकमुत्कृष्टं रसबन्धनम् उत्तमं केशरंजनं च ( धपरि. ६.२३ )
हिं.—मुरदासिंग.
**म.—मुरदाडशिंग.**
गु.—वोदार कॉंकरो.
बं.—मुरदोसिंग.
त.—मुदारसिंगु.
फा.—मुरदासिंग.
मुरदाडशिंग. खनिज पदार्थ आहे. हे औषध गुजराथ प्रदेशात अबुपर्वतावर सापडते. पापुद्रेयुक्त, पिवळ्या रंगाचे आहे. शीतवीर्याचे वातकफनाशक, पौरुषत्व वर्धक, पारदाला बंधन घालणारे आणि केसांना रंग देणारे आहे.

**बोद्धृ**-पु., आत्मा, जगद्बोधयिता बोद्धा इत्युच्यते ( चशा. ४.८ ) आत्मा.

**बोधक**-पु., रसनस्थः सम्यग् रसबोधनात् बोधकश्लेष्मा) पञ्चप्रकारेषु श्लेष्मस्वेकः ( असंसू. २०.६; अहसू. १२.१७ )
बोधक हा कफाच्या पाच प्रकारापैकी एक. जिभेच्या आश्रयाने असणारा, याच्यामुळे रसाचे ज्ञान होते म्हणून बोधक.

**बोधन**-न., जागृतिः ( सुशा. ४.३५ ) जागृति.

**बोधना**-स्त्री., वनस्पति० कर्कोटकी ( रा. ७.२७६ )
करटोली.

**बोधलब्धि**-स्त्री., लक्षण० मूर्च्छाक्षेपान्मुक्तिः, संज्ञालाभश्च ( र. १२.९० ) शुद्धीवर येणे.

**बोधि**-पु., वनस्पति० पिप्पलः (असंउ. ४४; र. ५.१६७, पिंपळ.

**-कुवल**-न., वितसितकमलम्, बोधो ज्ञानं विकासो वा, बोधिविकसितम्
उमललेले कमळ. झालेले ज्ञान.

**-वृक्ष**-पु., वनस्पति० पिप्पलः ( ध. ५.७८; चचि. २९.१५८ ) पिंपळ.

**बोल**-पु., न., भैषज्य० उग्रगन्धघनरसः, रसगन्धो, गन्धरसश्च, गुणाः-बोलं, तिक्तं, हिमं, उद्रिक्तरक्तं हन्ति, कफपित्तामयान् हन्ति, तथैव प्रदरादिरुजापहम् ( ध. ३.६३ ) कटु कषायं तिक्तोष्णं, रक्तदोषनुत् ( रा. ६.११८ )
हिं.—बोल, हीराबोल, बीजाबोल.
**म.—बोळ.**
गु.—हिराबोळ.
बं.—गंधरस, बोल, हिराबोल, खुनखारापी.
त.—वेळ्ळइप्पोलम्.
फा.—मुर.
रक्तबोळ. तिक्त, हिम, फार रक्तस्रावाचे स्तंभन करणारा. कफपित्ताचे विकारांना तसेच प्रदरादि आर्तव पीडा नाहीसे करणारा आहे.

**-बद्धरस**-पु., पारदयोग० रसभस्म वत्सनाभौ समौ गन्धको द्विगुणः, बोलो हरितालभस्म हिङ्गु कर्कोटीमूलं माक्षिकभस्म हरिद्रा कण्टकारी यवक्षारो लाङ्गली खर्जिका सैन्धवं मधूकसार-

श्लेतार्द्रकस्वरसेन सप्ताहं संमर्द्य बदराकारां गुटिकां कुर्यात्। श्लेष्मकासश्वासपाण्डुनाशनोऽयं योगः ( र. १३.४१-४३ )
बोलबद्धरस नावाचे सिद्धौषध. पाराभस्म ( १ ), बचनाग, ( १ ) गंधक, (२) बोळ, हरताळ-भस्म, हिंग, करटोलीचे मूळ, सुवर्णमाक्षिक, हळद, रिंगणी, जवखार, कळलावी, सज्जीखार, सैंधव, जेष्ठमधाचा शिरा, आल्याच्या रसात खल करावा. प्रमाण—बोराएवढी गोळी. **गुण**—कफ, खोकला, श्वास, पांडु नाशक.

**बोष्काणदेश**—पु., देश० **काबेलः, बोष्काणदेशजं हिङ्गु श्रेष्ठम्** ( असंसू. १२.६७ )
काबूल देश. या देशाचा हिंग प्रसिद्ध आहे.

**ब्रध्न**—पु., **चर्मलता, मांसपेशीति केचित्** (चवि. ७.१२)
चामड्याची वादी. काही कृमी ह्या आकाराचे असतात.
**शारीर० गुदम्** ( चचि. १९.६ ) गुद.
**रोग० वङ्क्षणसंधिषु यदा कुपितो दोषो ग्रन्थिवत् शोथं करोति तदा ज्वरशूलाङ्गसादैर्युक्तं तं ब्रध्नमिति निर्दिशेत्** ( चइ. ११.१५; चनि. ३.७ )
ब्रध्न रोगाचे नाव आहे. आडसंधिमध्ये येणारी गाठी-सारखी सूज, ज्वर, उदरशूळ, अंग गळणे यांनी युक्त असते. त्या विकारास हे नाव आहे.
**रोग० वातादिलिङ्गैर्वृषणे अन्त्रं निरेति । तम् अन्त्रवृद्धिलक्षणं ब्रध्नमिति निर्दिशेत् । तथैव मूत्रेण पूर्णं स्यात् तत् पूर्णं मृदु च; मेदसा चेत् शोथं, स्निग्धं, कठिनं च विद्यात्** (चचि. १२.९४)
ब्रध्न- वातादि दोषाच्या क्षोभाने आतडे अंडकोशात उतरते या विकारास आंत्रवृद्धि किंवा ब्रध्न म्हणतात. तसेच मूत्राने वृषण वाढले तर ते मृदु व भरलेलेसे वाटते. मेदाने ते दुष्ट झाले तर स्निग्ध, कठीण व सुजलेले दिसते.

**ब्रह्मन्**—न., **वेदः** ( सुसू. २९.३० ) वेद.
**तत्त्वज्ञानम्** ( चचि. २०.३ ) तत्वज्ञान.
**मोक्षः** ( चशा. ५.१९ ) मोक्ष.
**आत्मा** ( चशा. ४.८ ) आत्मा.
**परमात्मा** ( चशा. ५.४ ) परमात्मा.
**ओङ्कारः** ( चचि. १ (३).११; चचि. १.८० )
ओंकारस्वरूप ब्रह्म.
पु., **आदिदेवो ब्रह्मा; आयुर्वेदस्याऽऽद्यस्मरणकर्ता** ( सुसू. १.२०; सुसू. ३४.८; चसू. १.४ )
ब्रह्मदेव. आयुर्वेदाचा पहिला स्मरणकर्ता, **श्लेष्मप्रकृतिदेव०** ( सुशा. ४.६७ ) **बुद्धेरधिदैवतं ब्रह्मा** ( सुशा. १.७ ) **ब्रह्मा आत्मानं पातु** ( सुसू. ५.२९ )
कफप्रकृतीचा देव. बुद्धीचे दैवत. ब्रह्मा आत्म्याचे रक्षण करो.
**रससिद्धिप्रदायकः सप्तविंशतिसंख्याकेष्वन्यतमः** ( र. १.२-५ )
पाऱ्याची सिद्धि असणाऱ्या २७ तंत्रज्ञांपैकी एक.

**( ब्रह्माणी )**—स्त्री., **कृत्रिमधातु० पित्तलम्** ( ध. ६.२० )
पितळ.

**—कन्यका**—स्त्री., **वनस्पति० ब्राह्मी** ( रा. १५.१४८ )
ब्राह्मी.

**—काय**—वि., **चित्तप्रकृति० सात्विककायः, यस्मिन् मनुष्ये शौचमास्तिक्यं वेदाभ्यासो गुरुपूजनम्, अतिथिप्रियत्वं यागं इत्यादयो दृश्यन्ते, स ब्रह्मकायो ज्ञेयः** ( सुशा. ४.८१ )
सात्विक मनःप्रवृत्तीचा माणूस. ज्यात शुचित्व, आस्तिकपणा, वेदाभ्यास, गुरुपूजा, अतिथींची सेवा, व प्रेम, यज्ञ इत्यादी दिसतात तो.

**—काष्ठ**—न., **वनस्पति० तूलम्** ( ध. ५.६४ )
रुई, सावरी, कापूस.

**—कोशी**—स्त्री., **वनस्पति० अजमोदा** ( रा. ६.१५१ )
अजमोदा.

**—गर्भा**—स्त्री., **वनस्पति० अजगन्धा** ( रा. ४.१५३ )
बोकडासारखा वास येणारी वनस्पति.

**—घोष**—पु., **वेदध्वनिः** ( चसि. १२.१९(१) ) वेदघोष.

**—घ्नी**—स्त्री., **वनस्पति० कुमारी** ( रापरि. ५.११ )
कोरफड.

**—चर्य**—न., **वेदाध्ययनमिन्द्रियसंयमो वा** ( सुचि. २८.२८ ) **कामकर्मवर्जनम्, अमैथुनम् अयमेकान्ततः पथ्यतमविहारः** ( सुसू. २०.६ ) **ब्रह्मचर्यमायुष्यकराणां श्रेष्ठम्** ( चसू. २५.४० ) **त्र्युपस्तम्भेष्वेकः** ( चसू. ११.३४ )
वेदाध्ययन किंवा इंद्रिय संयम हे ब्रह्मचर्य होय. विषयसेवन वर्ज्य करणे यालाही ब्रह्मचर्य म्हणतात. हा संपूर्णतया अतिशय पथ्यकारक विहार. आयुष्य-वर्धकात ब्रह्मचर्य श्रेष्ठ. शरिराच्या तीन आधार-स्तंभापैकी एक.

**—चारिण**—न., **वनस्पति० तूलम्** ( ध. ५.६४ )
रुई, सावरी, कापूस.

स्त्री., **करुणी** ( रापरि. १०.२७ )
ग्रीष्म ऋतूत लाल फुले येणारी सूक्ष्म वनस्पती.

**-चारिन्**-वि., **अष्टविधमैथुनोपलक्षितस्त्रीसंगरहितः** ( सुशा. २.२८ ) ब्रह्मचारी.
स्त्रीचे सतत स्मरण, एकांतात स्त्रीशी संभाषण इत्यादी आठ प्रकारच्या मैथुनांगापासून अलिप्त असलेला.

**(-चारिणी )**-स्त्री., **ब्रह्मचर्यव्रतमाचरन्ती स्त्री** ( सुशा. २.२८; सुनि. १२.७ )
ब्रह्मचर्य व्रताचे आचरण करणारी स्त्री.

**-जटा**-स्त्री., **वनस्पति० दमनम्** ( ध. ३.६४ )
दवणा.

**-ज्योतिष्**-पु., **प्राचीनो रसाचार्यः** ( र. ९.६४ )
ब्रह्मज्योतिष- रसशास्त्री.

**-तीर्थ**-न., **वनस्पति० पुष्करमूलम्** ( रा. ६.९३ )
पोखरमूळ.

**-दण्डी**-स्त्री., **वनस्पति० अजदण्डी, कण्टपत्रफला चेत्यपरपर्यायौ** ( र. २४.६०; ११.५२; २५.८७; रापरि. ५.४७ ) **गुणाः- कटु, उष्णा, कफवातघ्नी, शोफापहा च** ( रापरि. ५.४७ )
हिं.—ब्रह्मदण्डी, उरकटारा.
**म.—ब्रह्मदण्डी.**
गु.—ब्रह्मदण्डी, तसकंटो.
बं.—छागलदाँडी, वामनदाँडी.
ब्रह्मदंडी, उत्कटारी, काटेरी; पाने, फळे असणारी.
**गुण**— तिखट, उष्ण, सूजनाशक, कफवातघ्नी.

**-दत्ता**-स्त्री., **वनस्पति० श्वग्रहजुष्टे प्रदेहार्थमुपयुज्यते** ( असंउ. ६ )
ब्रह्मदत्ता नांवाची वनस्पती. श्वग्रहबाधेवर लेपासाठी उपयोगी.

**-दारु**-न., **वनस्पति० तूलम्** ( ध. ५.६४ )
रुई, सावरी, कापूस.

**-द्वार**-न., **शिरसि ब्रह्मरन्ध्रस्थानम्** ( र. १२.९९ )
ब्रह्मद्वार. डोक्यातील ब्रह्मरंध्राची जागा.

**-पत्री**-स्त्री., **वनस्पति० वाराहीकन्दः** ( रा. ७.१३४ )
डुक्करकंद.

**-पवित्र**-पु., **वनस्पति० कुशः दर्भः** ( रा. ८.२०७ )
दर्भ.

**-पादप**-पु., **वनस्पति० विकङ्कतः** ( रा. ९.५५ )
वेहळी. बेहेकळ.

**-बीज**-न., **पलाशबीजम्** ( र. ७.२०२ )
पलाश बी. पळसपापडी.

**-मूल**-न., **पलाशमूलम्** ( र. ३.८२ ) पळसाचे मूळ.

**-मेखल**-पु., **वनस्पति० मुञ्जः** ( ध. ४.१३२ )
मुंजतृण.

**-राक्षस**-पु., **भूताधिपति०** ( असंउ. ७ )
ब्रह्मराक्षस.

**-रीति**-स्त्री., **कृत्रिमधातु० पित्तलम्** ( ध. ६.२० )
पितळ.

**-वर्चसिन्**-वि., **ब्रह्मतेजोयुतः** ( सुचि. २८.४ )
ब्रह्मतेजयुक्त.

**-विद्**-वि., **ब्रह्मवेत्ता, मुक्तः** ( चशा. १.१५५ )
ब्रह्मज्ञानी. मुक्त.

**-वृक्ष**-पु., **वनस्पति० पलाशः** ( र. २०.६८ ) पळस.

**-वृक्षक**-पु., **वनस्पति० पलाशः** (ध. ५.१६१) पळस.

**-सुवर्चला**-स्त्री., **वनस्पति० हिरण्यक्षीरा, पुष्करसदृशपत्रा, द्रोणी प्रावेशिकरसायनेष्वेकौषधिः** ( चचि. १ (४) ७; चचि. १.५८ ) **तस्या उत्पत्तिस्थानं देवसुन्दे ह्रदवरे तथा सिन्धौ महानदे जलान्तेषु च मेध्या ब्रह्मसुवर्चला दृश्यते** ( सुचि. ३०.३१ ) **महौषधि० सोमसमवीर्या, सक्षीरा, पद्मिनीप्रख्या अरत्निमात्रक्षुपका, द्व्यङ्गुलसम्मितैः पत्रैर्नीलोत्पलाकारपुष्पैरंजनसन्निभैः फलैश्च, देवी ब्रह्मसुवर्चलेति जानीयात्** ( सुचि. ३०.२१-२२ )
ब्रह्मसुवर्चला वनस्पती. सोनेरी-पिवळट चीक येणारी, पुष्करासारख्या पानांची द्रोणी प्रावेशिक रसायनामध्ये उपयोगी पडणारी आहे. देवसुंद सरोवराचे सिंधूनदाच्या काठी आढळते. सोमासारख्या वीर्याची दुधाळ कमलिनीसारखी हातभर, दोन अंगुळाइतक्या पानांची निळ्या कमळासारखी फुले असलेली, सुरम्यासारख्या फळांची वनस्पती.
**ब्राह्मी** ( ध. ४.१०० ) ब्राह्मी.

**-सुवर्चसा**-स्त्री., **वनस्पति० भार्ङ्गी** ( ध. १.६८ )
भारंगी.

**-स्वन**-पु., **वेदघोषः, अयं प्रस्थाने प्रशस्तः** ( सुसू. २९.३० ) वेदघोष.

**ब्रह्मण्य**-पु., **वनस्पति० मुञ्जः** ( रा. ८.२०४ )
मुंज तृण.
न., **तूलम्** ( ध. ५.६४ ) कापूस, रुई, सावरी,

**ब्रह्मर्षिपुत्र**–पु., सुश्रुतः विश्वामित्रस्य पुत्रः, 'विश्वामित्रो हि राजर्षिरेव ब्रह्मर्षित्वं तपसा गतः' ( सुनि. ७.३)
ब्रह्मर्षिपुत्र. विश्वामित्राचा मुलगा. राजर्षि विश्वामित्र तपाने ब्रह्मर्षि झाला.

**ब्रह्मादनी**–स्त्री., वनस्पति० हंसपादी ( रा. ५.१६७ )
हंसपादी.

**ब्रह्मोपनेतृ**–पु., वनस्पति० पलाशः ( रा. १०.१७४ )
पळस.

**ब्राह्म**–न., ब्रह्मणा प्रोक्तम् ( असंउ. ४९ )
ब्रह्मदेवाने म्हटलेले.
पु., योग० कटुकालाबुमूलानि गवां पित्तेन कल्कीकुर्यात् योगोऽयं मणिवत् सन्निधधारणेनाऽपि विषहन्ता तथा च सर्वकर्मसु पूजितः ( असंउ. ४० )
ब्राह्म नावाचे सिद्धौषध. कडु भोपळा मूळ, इत्यादींनी युक्त. केवळ जवळ बाळगल्यानेही विषनाशक.
न., चित्तप्रकृति० शुद्धसात्विकप्रकृतिः, शुचिं सत्याभिसंधं, जितात्मानं, संविभागिनं, ज्ञानविज्ञानवचनप्रतिवचनसंपन्नं, स्मृतिमन्तं, कामक्रोधलोभमानमोहेर्ष्यामर्षापेतं, समं सर्वभूतेषु ब्राह्मं विद्यात् ( चशा. ४.३७ (१))
शुद्ध सात्विक प्रकृती. शुचि, सत्याचा पाठीराखा, मनोनिग्रही, प्रीतीचे योग्य वाटप करणारा, ज्ञान विज्ञान प्रश्नोत्तर कुशल, मतिमान, काम-क्रोध-लोभ-मान-मोह-ईर्ष्या-मत्सरविरहित, सर्व प्राणिमात्रावर समत्व दृष्टीने पहाणारा, ब्राह्म किंवा शुद्ध सात्विक प्रकृतीचा पुरुष समजावा.

**–कन्द**–पु., वाराहीकन्दः ( रा. ७.१३६ ) डुक्करकंद.

**–धूप**–पु., धूपकल्प० सर्वरोगेषूपयुक्तः ( काकधूपाध्याय १. ) धूप. सर्व रोगांमध्ये उपयोगी.

**–मुहूर्त**–पु., रात्रेरुपान्त्यो मुहूर्तो ब्राह्मः, मुहूर्तो नाडिकाद्वयम्, स्वस्थ आयुषो रक्षार्थं ब्राह्मे मुहूर्ते उत्तिष्ठेत्। अत्र रात्रेश्चतुर्घटिकावशेषे समुत्थानं कार्यमिति स्थितम्। ब्राह्मश्च पश्चिमयामस्य नाडिकाद्वयम्, रात्रेश्चतुर्दशो मुहूर्तो ब्राह्मो मुहूर्तः ( अहसू. २.१ ) 'रात्रेश्च पश्चिमे यामे मुहूर्तो ब्राह्म उच्यते' इति हलायुधकोशे।
ब्राह्म मुहूर्त, रात्रीचा शेवटचा १४ वा मुहूर्त. स्वस्थ निरोगी मनुष्याने या वेळी उठावे. चार घटका रात्र उरली असता दररोज उठावे.

**–रसायन**–न., जराव्याधिशमनार्थं रसायन० आमलकायसं ब्राह्मरसायनम्–करप्रचितानां यथोक्तगुणानामामलकानामुद्धृतास्थ्नां शुष्कचूर्णितानां माघे फाल्गुने वा मासे त्रिःसप्तकृत्वः स्वरसपरिपीतानां पुनः शुष्कचूर्णीकृतानामाढकमेकं ग्राहयेत्। अथ जीवनीयानां बृंहणीयानां स्तन्यजननानां शुक्रवर्धनानां वयःस्थापनानां षड्विरेचनशताश्रितीयोक्तानामौषधगुणानां चन्दनागुरुधवतिनिशखदिरशिंशपाऽसनसाराणां च खंडशः कृत्तानामभयाबिभीतकपिप्पलीवचाचव्यचित्रकविडंगानां च समस्तानामाढकमेकं दशगुणेनाम्भसा साधयेत्। तस्मिन्नाढकावशेषे रसे सुपूते तान्यामलकचूर्णानि दत्त्वा गोमयाग्निभिः वंशविदलशरतेजाग्निभिर्वा साधयेत् यावदपनयाद्रसस्य, तमनुपदग्धमुपहृत्यायसीषु पात्रीष्वास्तीर्य शोषयेत्। सुशुष्कं तत् कृष्णाजिनस्योपरि दृषदि श्लक्ष्णपिष्टमयःस्थाल्यां सम्यक् निधापयेत्। तच्चूर्णम् अयश्चूर्णाष्टभागसंप्रयुक्तं मधुसर्पिभ्यामग्निबलमभिसमीक्ष्य प्रयोजयेदिति। इदं रसायनं जराव्याधिप्रशमनं बुध्दीन्द्रियबलप्रदमस्ति (चचि. १(३).३-६)
जे जरा म्हणजे म्हातारपणाची चिन्हे अकाली उत्पन्न होऊ देत नाही व सर्व व्याधींचे शमन करते ते रसायन होय. आमलक– अयस—ब्राह्मरसायन हे त्यापैकीच एक आहे. कृती—झाडावर माघ, फाल्गुनात तयार झालेले आवळे हाताने काढून घेऊन आतील आठळी काढून त्याचे बारीक तुकडे करून आवळ्याच्याच रसाची २१ वेळा भावना देऊन, वाळवून चूर्ण करून १ आढक म्हणजे २५६ तोळे घ्यावे.
जीवनीय, बृंहणीय, स्तन्यजनन, शुक्रवर्धक, वयःस्थापन, षड्विरेचन शताश्रितीय अध्यायातील गणात वर्णिलेली औषधे घेऊन चंदन, अगरू, धावडा, तिवस, खैर, शिसव, असाण्याचा नार यांचे बारीक तुकडे करून त्याबरोबर हिरडा, बेहडा, पिंपळ, वेखंड, चवक, चित्रक, वावडिंग यांचेही जवकूट तयार करून ही मिळून २५६ तोळे औषधे घ्यावी. व सर्वांचा १० पट पाण्यात काढा करून तो १/१० शिल्लक ठेवून तो काढा वस्त्राने गाळून घ्यावा. त्यात वरील आवळ्यांचे चूर्ण घालून रानशेणीच्या अग्नीवर शिजवावे. किंवा बांबूच्या कामट्या इ० च्या अग्नीवर शिजवावे. नंतर कोरडे होत आल्यावर करपले नाहीसे पाहून उतरून ते एका स्वच्छ लोखंडी ताटात पसरून

ठेवावे. नंतर वाळल्यावर काळया हरणाच्या चामड्यावर अथवा दगडी पाट्यावर अगदी बारीक वाटून लोखंडी ताटात नीट ठेवावे. त्या चूर्णात ⅛ लोहभस्म मिसळून ते अग्निबल पाहून मधु व सर्पि ( तूप ) यांचे बरोबर रसायन विधीने घ्यावे. याने जराव्याधि नाहीशा होतात. तसेच बुद्धि–इंद्रिये यांना बल येते.

**प्रथमं ब्राह्मरसायनम्**–पञ्चानां पञ्चमूलानां प्रतिद्रव्यं दशपलोन्मितान्भागान्, हरीतकीसहस्रं नवं त्रिगुणामलकं च गृहीत्वा, दशगुणेऽम्भसि पाचयेत्। दशभागावशेषं ग्राहयेत्। हरीतकीनामामलकानां निरस्थिकल्कं ग्राहयेत्। तस्मिन् निर्यूहे मण्डूकपर्ण्याः पिप्पल्या शङ्खपुष्प्याः प्लवस्य मुस्तस्य, विडङ्गस्य, चन्दनाऽगुरुणोस्तथा मधुकस्य, हरिद्रायाः, वचायाः कनकस्य, सूक्ष्मैलायास्त्वचः, प्रत्येकं चतुष्पलं भागं चूर्णं दापयेत्। तुलयाऽधिकं सितोपलाचूर्णं दापयेत्। तैलस्य द्व्याढकं,सर्पिषस्त्रीणि गृहीत्वा, तत्सर्वमौदुम्बरे पात्रे मृदुनाऽग्निना पाचयेत्। शीतं लेह्यं च ज्ञात्वा स्नेहार्धप्रमाणं क्षौद्रं संसृजेत्। तस्य मात्रां प्रयोजयेत्। इदं ब्राह्मरसायनं भुंजानो दीर्घमायुर्वयश्चाग्र्यं कामांश्चेष्टान् समश्नुते (चचि. १.४१-५७)

पहिले ब्राह्मरसायन. पाचही पंचमूळाचे प्रत्येक द्रव्य ४०-४० तोळे, हिरडा नवा एक हजार आणि तीन हजार आवळे घेऊन दहापट पाण्यात शिजवावे. एक दशांश शिल्लक ठेवावे. हिरडा, आवळा यांच्या आठळया काढून टाकाव्या. त्या काढ्यात ब्राह्मी, पिंपळी, शंखपुष्पी, क्षुद्र व मोठा नागरमोथा, वावडिंग, चंदन, अगरु, ज्येष्टमध, हळद, वेखंड, नागकेशर, लहान वेलदोडा, दालचिनी, ही प्रत्येक सोळा तोळे व खडीसाखर चारशे तोळे घालावे. तेल दोन आढक म्हणजे ५१२ तोळे, तूप तीन आढक म्हणजे ७६८ तोळे घेऊन उंबराच्या डोणीत घालून मृदु अग्नीने पचवावे. नंतर थंड झाल्यावर त्यात स्नेहाच्या अर्धे मध घालावे. हे सर्व मिश्रण एकरूप होईतो ठेवून नंतर योग्य प्रमाणाने उपयोग करावा. हे खाणारा दीर्घ आयुष्य तारुण्य व इच्छिलेले सर्व मिळवितो.

**द्वितीयं ब्राह्मरसायनम्**–यथोक्तगुणानामामलकानां सहस्रं पिष्टस्वेदनविधिना पयस ऊष्मणा सुस्विन्नमनातपशुष्कमनस्थि चूर्णयेत्। तदामलकसहस्रस्वरसपरिपीतं स्थिरापुनर्नवाजीवन्तीनागबलाब्रह्मसुवर्चलामण्डूकपर्णीशतावरीशंखपुष्पीपिप्पलीवचाविडङ्गस्वयंगुप्तामृताचन्दनागुरुमधुकमधूकपुष्पोत्पलपद्ममालतीयुवतीयूथिकाचूर्णाष्टभागसंयुक्तं पुनर्नागबलासहस्रपलस्वरसपरिपीतमनातपशुष्कं द्विगुणितसर्पिषा क्षौद्रसर्पिषा वा क्षुद्रगुडाकृतिं कृत्वा शुचौ दृढे घृतभाविते कुम्भे भस्मराशेरधः स्थापयेत् अन्तर्भूमेः पक्षं कृतरक्षाविधानमथर्ववेदविदा, पक्षात्यये चोद्धृत्य कनकरजतताम्रप्रवालकालायसचूर्णाष्टभागसंयुक्तमर्धकर्षवृद्ध्या यथोक्तेन विधिना प्रातः प्रातः प्रयुञ्जानोऽग्निबलमभिसमीक्ष्य, जीर्णे च षष्टिकं पयसा ससर्पिष्कमुपसेवमानो यथोक्तान्गुणान् समश्नुत इति। इदं महर्षिगणसेवितं ब्राह्मं रसायनं प्रयुञ्जानो महाबलो दीर्घायुररोगः प्रजानां प्रियः सिद्धार्थश्चन्द्रादित्यसमद्युतिः, स्मृतिमान्, विक्रमशालि धरणीधरसारो वायुसमविक्रमो गात्रे विषमपि अविषवत् प्राप्नुवन् जीवति ( चचि. १.५८-६१ )

दुसरे ब्राह्मरसायन—चांगले पक्के रसदार १००० आवळे मोदकपात्रात दुधाच्या वाफेने चांगले वाफवून, सांवलीत वाळवून, आठळया काढून चूर्ण करावे. त्याला हजार आवळ्याच्या रसाची भावना द्यावी. नंतर सालवण, पुनर्नवा,हरणदोडी, नागबला ( चिकणा ) ब्रह्मसुवर्चला ( महौषधि ) ब्राह्मी, शतावरी, शंखपुष्पी, पिंपळी, वेखंड, वावडिंग, खाजकुहिली, गुळवेल, चंदन, अगरु, ज्येष्ठमध, मोहाची फुले, निळे व लाल कमळ, मालतीपुष्प, नेवारी व जुईची फुले यांची चूर्णे प्रत्येकी एक अष्टमांश घेऊन त्यात नागबला ( चिकणा ) चार हजार तोळे त्याच्याच ( चिकण्याच्या ) रसाची भावना दिलेले. सावलीत वाळविलेले मिसळून दुप्पट तूप किंवा मधतूप घालून लहान गोळे करुन तुपाने मुरलेल्या मडक्यात घालून भस्माच्या राशीत जमिनीत पुरुन पंधरा दिवस ठेवावे. अथर्ववेदोक्त विधीने नीट रक्षण करावे. नंतर सोने, रुपे, तांबे प्रवाळ, लोह यांचे ⅛ चूर्ण घालून, ते रसायन अर्धा तोळा प्रमाणाने वाढवीत दररोज सकाळी यथोक्त विधीने घ्यावे. अग्निबलाकडे पहावे. हे पचल्यावर साठेसाळीचा भात तूप घालून दुधाशी खावा, याने महाशक्तिमान, दीर्घायुषी, निरोगी, प्रजेला प्रिय, सर्व कार्य सिद्ध होणारा, सूर्या-

सारखा तेजस्वी. स्मृतिमान, वायूसारखा पराक्रमी, पर्वतासारखा सारवान, विष पचवूनही जगतो.

**ब्राह्मण**–पु., **ब्राह्मणसदृशः ये च पन्नगा मुक्ता रूप्यप्रभाः कपिलाः, सुगन्धयः, सुवर्णाभाश्च भवन्ति, ते जात्या ब्राह्मणाः स्मृताः** (सुक.४.२५) सर्प-ब्राह्मण जातीचा. जे सर्प मोती अथवा चांदीच्या प्रभेसारखे किंवा कपिल वर्णाचे, हिंसक वृत्तीचे, सोनेरी रंगाचे असतात ते ब्राह्मणवर्ण सर्प समजावे.

**द्विजः, विप्रः** ( सुसू. २.३ ) ब्राह्मण.

( **ब्राह्मणी** )–स्त्री., **वनस्पति० स्पृक्का** ( ध. ३.६२ ) पिंडिका नावाची सुगंधी वनस्पती.

**कृत्रिमधातु० पित्तलम्** ( रा. १३.१८ ) पितळ.

**–यष्टि**–स्त्री., **वनस्पति० भार्ङ्गी** ( ध. १.६८ ) भारंगी.

**–यष्टिका**–स्त्री., **वनस्पति० भार्ङ्गी** ( ध. १.६८ ) भारंगी.

**ब्राह्मणेष्ट**–न., **वनस्पति० तूलम्** ( ध. ५.६४ ) कापूस.

**ब्राह्मणिका**–स्त्री., **आग्नेयकीट०** (सुक. ८.९; असंउ.४३) **पिपीलिकाभेदो, वरटी, तया दष्टे संति दंश-स्थाने श्वयथुरग्निस्पर्शवद्दाहशोफौ च भवतः** ( सुक. ८.३४ ) गांधीलमाशी. ही चावल्याने सर्वांगावर सूज, अग्नीच्या स्पर्शाप्रमाणे चटका व सूज दंशाच्या जागी होतात.

**वनस्पति० स्पृक्का** ( रा. १२.११३ ) पिंडिका.

**ब्राह्मिका**–स्त्री., **वनस्पति० ब्राह्मी** ( र. २७.१०० ) ब्राह्मी.

( **ब्राह्मी** )–वि., **ब्राह्मी विभूतिः, आत्मविशेषस्य जगत्स्रष्टु-र्विभूतिः, यथा खलु ब्राह्मी विभूतिर्लोके तथा पुरुषेऽप्यान्तरात्मिकी विभूतिः** ( चशा. ५.५ ) आत्मविशेषत्वाने जगाची निर्माती विभूती. लोकात जशी ही तशी पुरुषामध्ये आतली विभूति. (आत्मा).

स्त्री., **तेजोवती** ( रा. ३.३९३ ) मालकांगोणीप्रकार.

**अजगन्धा** ( रा. ४.१५३ ) अजगंधा.

**रेवतीग्रह०** ( का.चि. बालग्रह ) एक रेवतीग्रह.

**वनस्पति० ब्रह्मसुवर्चला** ( असंउ. १ ) ब्रह्मसुवर्चला. ब्राह्मी.

**वनस्पति० मण्डूकपर्णी** (सुचि.७.२४; सुउ.६२.३०) **प्रजास्थापनगणे एका** ( चसू.४.१८ ) **अतत्त्वाभि-निवेशाख्ये मानसविकारे अस्याः स्वरसः उपयुक्तः** (चचि. १०.६२) **एतद्रससाधितं घृतं कुष्ठेषूपयुज्यते** ( असंचि. २१ ) **गुणाः–रसे तिक्ता कषाया हिमा शोफपाण्डुज्वरापहा, दीपनी, कुष्ठकंडूघ्नी, वातकफजित्, प्लीहरोगघ्नी, आयुष्या, मेध्या, लघुः, स्वर्या, स्मृतिप्रदा, कुष्ठपाण्डुमेहास्रकासजित्** ( ध. ४.१०१-१०२ ) **बुद्धिप्रज्ञावर्धिनी च**

हिं.—ब्राह्मी, ब्रह्ममाण्डूकी, वरंभी, चेरली, खुलकुढी.

**म.—ब्राह्मी.**

गु.—ब्राह्मी, विद्याब्राह्मी, खड भरामी.

बं.—ब्राह्मीशाक, अधविर्णी, थुलकुडि, थालकुनि, ब्रह्ममण्डूकी.

त.—वीमी, वल्लरीकेरी, बबस्सा.

फा.—जरनव.

**द्वितीया ब्राह्मी–वयःस्था, मत्स्याक्षी, मीनाक्षी, सोम-वल्लरी इति अपरनामभिः प्रसिद्धा, ग्रन्थे चोल्लिखिता गुणाः– शिशिरा, रुच्या, व्रणदोष-क्षयापहा** ( रापरि. ५.४१ )

ब्राह्मी नावाची वनस्पती. प्रजास्थापनगणामध्ये उपयोगात आणली आहे. अतत्वाभिनिवेश नावाच्या मानसविकारामध्ये याचा स्वरस उपयोगात आणला जातो. ह्या वनस्पतीच्या रसात सिद्ध केलेले तूप कुष्ठरोगात उपयोगी आहे. ब्राह्मीचे **गुण**— कडु, तुरट, थंड, सूज, पांडु, ज्वर नाहीशी करणारी, दीपन, कुष्ठ कंडू नाशक, वातकफनाशक, प्लीहारोग नाशक, आयुष्य बुद्धि स्मरणशक्ति यांचे वर्धन करणारी, लघु, स्वराला हितकारक, कुष्ठ पांडु मेह पित्त व खोकला नाहीशी करणारी आहे.

**ब्राह्मी**–स्त्री., **वनस्पति० ब्रह्मसुवर्चला** ( असंउ. १ ) ब्राह्मी.

**–घृतरसायन**–न., **योग० ब्राह्मीस्वरसप्रस्थद्वये घृतप्रस्थं विडङ्गतण्डुलानां कुडवं द्वे द्वे वचामृतयोः द्वादश हरीतक्यामलकबीभितकानि श्लक्ष्णपिष्टान्या-वाप्यैकध्यं साधयित्वा स्वनुगुप्तं निदध्यात्। ततः पूर्वविधानेन मात्रां यथाबलमुपयुञ्जीत, जीर्णे पयः सर्पिरोदन इत्याहारः, एतेनोर्ध्वमधस्तिर्यक् कृमयो निष्क्रामन्ति। अलक्ष्मीरपक्रामति। पुष्करवर्णः, स्थिरवयाः श्रुतनिगादी, त्रिवर्षशतायुर्भवति। एतदेव कुष्ठविषमज्वराऽपस्मारोन्मादविषभूतग्रहेष्वन्येषु च महाव्याधिषु संशोधनमादिशन्ति** ( सुचि. २८.६ ) ब्राह्मीघृतरसायन—ब्राह्मी स्वरस १२८ तोळे, तूप ६४ तोळे, सालपट काढलेले वावडिंग दाणे १६

तोळे, वेखंड आणि गुळवेल ८।८ तोळे, हिरडे, बेहडे, आवळे प्रत्येकी १२।१२ नग, बारीक वाटून एकत्र शिजवून तूप उरल्यावर बंदोबस्ताने ठेवावे. नंतर त्यांचा अग्निबलानुसार उपयोग करावा. ते पचल्यावर दूध-तुपाशी भाताचा आहार घ्यावा. यामुळे अधोमार्गाने व ऊर्ध्वमार्गाने कृमि निघतात. दारिद्र्य जाते, वर्ण कमलपत्रासारखा होतो, तारुण्य प्राप्त होते, ऐकलेले योग्य प्रकारे ग्रहण होते, तीनशे वर्षांचे आयुष्य लाभते. हे तूप कुष्ठ, विषमज्वर, अपस्मार, उन्माद, विषाचे उपद्रव, भूतबाधा, ग्रह-पीडा आणि इतरही मोठमोठ्या रोगात संशोधन म्हणून उपयोगी आहे.

**-रसायन**-न., योग०, **मलरहिते पलाशोलूखले ब्राह्मी संकुट्य तद्रसमाढकमात्रं गृह्णीयात्। तत्र च प्रस्थमात्रं गोघृतं संमिश्रय पाठाऽऽमलकीहरिद्रा-त्रिवृतां कल्केन घृतपाकं कुर्यात्। अनुपानं-विडङ्ग-पिप्पलीसैन्धवजटामांसीनां चूर्णम्, मर्यादा सप्तरात्रं पक्षो मासो वा** ( र. २६.४८ )

ब्राह्मीरसायन—पळसाच्या खोडाला कोरून केलेल्या खलाला स्वच्छ करून त्यात ब्राह्मीचा पाला कुटून २५६ तोळे रस घ्यावा. त्यात ६४ तोळे तूप ( गाईचे ) घालून पहाडमूळ, आवळकटी, हळद व निशोत्तर वाटून तो गोळा मिसळावा व तूप सिद्ध करावे व सेवन करावे. अनुपान-वावडिंग, पिंपळी, सैंधव, जटामांसी यांचे चूर्ण. मुदत-सात दिवस, पंधरा दिवस किंवा १ महिना.

**-स्वरसरसायन**-न., योग०, **हृतदोष एवाऽगारं प्रविश्य प्रतिसंसृष्टभक्तो ब्राह्मीस्वरसमादाय सहस्रसंपाताभिहुतं कृत्वा यथाबलमुपयुञ्जीत। जीर्णौषधश्चापराह्ने यवागूमलवणां पिबेत्। क्षीर-सात्म्यो वा पयसा भुञ्जीत। एवं सप्तरात्रमुपयुज्य ब्रह्मवर्चसी मेधावी भवति। द्वितीयं सप्तरात्रम् उपयुज्य ग्रन्थमीप्सितमुत्पादयति नष्टं चास्य प्रादुर्भवति। तृतीयं सप्तरात्रमुपयुज्य द्विरुच्चारित शतमप्यवधारयति। एवमेकविंशतिरात्रमुपयुज्याऽ-लक्ष्मीरपक्रामति। मूर्तिमती चैनं वाग्देव्यनुप्रविशति। सर्वाश्चैनं श्रुतय उपतिष्ठन्ति। श्रुतधरः पञ्चवर्ष-शतायुर्भवति** ( सुचि. २८.५ )

ब्राह्मीस्वरसरसायन—शरीर शुद्ध करून कुटिप्रवेश केलेल्या आणि शोधनानंतर क्रमशः नित्याचा आहार घेऊ लागलेल्या व्यक्तीकरता ऋग्वेदाच्या सहस्रसंपात अध्यायातील मंत्रांनी सहस्र आहुतींनी होम करून शक्तीप्रमाणे सेवन करावा. ते औषध पचल्यावर अपराण्हकाळी मीठ न घातलेली यवागू प्यावी. दूध मानवत असेल तर दुधाबरोबर आहार घ्यावा. असे ७ दिवस केल्याने ब्रह्मतेज येते, बुद्धी वाढते, दुसऱ्या सप्ताहातही घेतल्यास इच्छेप्रमाणे ग्रंथरचना करू शकतो, विसरलेले आठवते; तिसऱ्या सप्ताहात घेतल्याने केवळ दोनदा उच्चारलेल्या शेकडो गोष्टी लक्षात रहातात. असे हे २१ दिवसाचे सेवन दारिद्र्य नाशक होते, मूर्तिमंत वाग्देवताच त्याचे ठिकाणी प्रवेश करते, त्याला सगळे वेद आकलन होतात व स्मरणशक्ति अपूर्व असा तो पाचशे वर्षे जगतो.

## भ

**भक्त**-पु., **ओदनः ' सुधौतांस्तण्डुलान्स्फीतांस्तोये पञ्च-गुणे पचेत्' इति वैद्यकशब्दसिन्धुः** ( सुसू. २.४ ) पाचपट पाण्यात शिजवलेला भात.

**भोजनम्** ( सुचि. ३७.६९ ) भोजन.

**-द्वेष**-पु., **अन्नद्वेषः** ( र. २०.२३२; सुसू. ३२.४ ) अन्न नकोसे वाटणे.

**-रुचि**-स्त्री., **आहाररुचिः** ( सुसू. ४२.९ ) अन्नाची चव असणे.

**-श्रद्धा**-स्त्री., **भक्तेच्छा** ( असंसू. २६ ) खाण्याची इच्छा.

**भक्तानभिनन्दन**-न., **रोग० भोजनारोचनम् अरोचकः** ( चसि. १.३३ ) खाण्याची इच्छा नसणे, अन्नाची चव नसणे.

**भक्तायन**-न., **अन्नवहस्रोतः** ( सुउ. ५७.३ ) अन्नवह स्रोतस.

**भक्तारुचि**-स्त्री., **लक्षण० अरोचकः अनन्नाभिलाषः** ( सुचि. ३४.१५ ) अन्नाची इच्छा नसणे.

**भक्ताश्रद्धा**-स्त्री., **लक्षण० भोजनेऽरुचिः** (चसू. १७.५६) भोजनाची चव नसणे.

**भक्ति**-स्त्री., **श्रद्धा इच्छा** (चइ. १.३) इच्छा. श्रद्धा, प्रेम.

**-निश्चय**-पु., **इच्छा निश्चयः** ( चसू. २७.३०८ ) व्यक्ति व देशभेदाने आहार्य द्रव्यांचे प्रकार, आवड व प्रमाणादींचा ठाम सिद्धांत.

**इयत्तानिश्चयः** ( चसू. २७.३०८ ) मर्यादेची निश्चिति. मर्यादा ठरविणे.

**भक्तोपघात**–पु., उपघात इच्छाप्रतिरोधोऽनभिलाषो वा तेन भक्तोपघातः अनन्नाभिलाषः अरोचकः ( सुउ. ५७.३ ) खाण्याची इच्छा नसणे.

**भक्तोपरि**–अ., (परिव०) भोजनान्ते, दशौषधकालेष्वेकः कालः, अधोभक्तम् इति सुश्रुतेन निर्दिष्टः ( सुउ. ९.८ )
भोजनाचे शेवटी किंवा नंतर औषध घेण्याच्या १० प्रकारच्या काळातील एक.

**भक्तोपरोधतृषा**–स्त्री., अन्नाऽनभिलाषादन्नमार्गस्य रुद्धत्वाद्वा तृषा भक्तच्छेदजन्या तृषा ( चचि. २२.५२)
अन्नाची इच्छा नसल्याने अथवा अन्नमार्ग रुद्ध होऊन अन्न न गेल्यामुळे वाटणारी तहान.

**भक्षक**–पु., वनस्पति० गोक्षुरः ( ध. १.१०२ ) गोखरू.

**भक्षटक**–पु., वनस्पति० गोक्षुरः ( ध.१.१०२ ) गोखरू. गोक्षुर० क्षुद्रक्षुरः ( रा. ३.१२१ ) बारीक गोखरू.

**भक्ष्य**–वि., भक्षणार्हः, भक्षणीयः कृतान्न० मोदकशष्कुल्यादिः ( चसू. २७.२६८ ) फलमांसादिसंयोगसाधितभक्ष्यविशेषगुणाः- बल्यो गुरुर्बृंहणो हृदयप्रियश्च (सुसू. ४६.४०७-४०८) गोधूमपिष्टविकृतिरूपो यः क्षीरेणाऽऽलोड्य क्रियते, स बल्यो वृष्यो हृद्यः सुगन्धिकोऽदाही पुष्टिकरो दीपनः पित्तनाशनश्च ( सुसू. ४६.३९२-३९३ ) घृतपक्वभक्ष्यगुणाः– हृद्यः सुगन्धिर्लघुर्वातहरो बल्यो वर्णदृष्टिप्रसादनः ( सुसू. ४६.४०५ ) तैलपक्वभक्ष्यगुणाः– विदाही गुरुः पाके कटुरुष्णो मारुतघ्नो दृष्टिघ्नः पित्तलस्त्वक्प्रदूषणश्च ( सुसू. ४६.४०५-६ ) माषपिष्टकृतभक्ष्यगुणाः– विष्टम्भी पित्तसमः श्लेष्मघ्नो भिन्नवर्चा बल्यो वृष्यो गुरुश्च ( सुसू. ४६.४०२-४०३ ) विरूढधान्यभक्ष्यगुणाः– गुरुर्विदाह्युत्क्लेशकरो रूक्षो दृष्टिप्रदूषणो वातपित्तलश्च ( सुसू. ४६.४०४ )
खाण्याकरिता तयार केलेले निरनिराळे खाद्य पदार्थ— मोदक, करंजी वगैरे. फल, मांस वगैरेंच्या संयोगाने तयार केलेले भक्ष्य पदार्थांचे विशेष **गुण**— बलकर, पचनास जड, पौष्टिक, हृदयाला हितकर असतात. गव्हाची कणिक व त्यापासून **दुधात भिजवून तयार केलेल्या भक्ष्य पदार्थांचे गुण**— बलकर, पुष्टिकर, हृदयाला हितावह, सुगंधिक, दाह निर्माण न करणारे, अग्निदीपक, पित्तशामक. **तुपात तळलेल्या भक्ष्य पदार्थांचे गुण**— हृदयाला हितकर, सुगन्धि, पचनास हलके, वातशामक, बलकर, शरिराचा वर्ण व दृष्टि सुधारणारे असतात. **तेलात तळलेले भक्ष्य पदार्थ**— घशात जळजळ करणारा, पचनास जड, पचनानंतर तिखट, उष्ण, वातनाशक, दृष्टिनाशक, पित्तवर्धक, त्वचा—रक्त यांना बिघडविणारे असतात. **उडदाच्या पिठाचे पदार्थ**—मलावष्टंभक, पित्तवर्धक, कफनाशक, द्रवमळ करणारे, बलकर, शुक्रवर्धक, पचनाला जड. **मोड आलेले धान्याचे पदार्थ**— पचनास जड, जळजळ करणारे, मळमळ उत्पन्न करणारे, रुक्ष, दृष्टि–दोषकर आणि वातपित्तवर्धक.

**–कल्प**–पु., अपूपादिविधानम्, अत्र कल्पशब्दो विधानार्थो न तु प्रत्ययरूप इति बोध्यम् ( सुचि. ३०.५ ड. ) खाद्य पदार्थ करण्याचे प्रकार.

**–पत्री**–स्त्री., वनस्पति० नागवल्ली ( रापरि. २१.६ ) पानवेल.

**–बीज**–पु., वनस्पति० प्रियालः ( रा. ११.१०२ ) चारोळी, खिरणी.

**–संविधि**–पु., भक्ष्यभक्षणम्, संविधिः संविधानम् आयोजनं विधानं वा (चसू.२७.३३२) खाद्य पदार्थांचा आहार.

**भग**–पु., शारीर० योनिः ( चवि. ८.११७ ) योनि. वृषणगुदयोर्मध्यभागः ( र. २४.१०९ ) वृषण व गुद यांमधील भाग. देवता० द्वादशादित्यानामेकतमोऽयम् (र.३०.१२५) बारा आदित्यांपैकी एक आदित्य. विवाह देवता.

**–विस्तार**–पु., भगरन्ध्रम् तस्य परिणाहो द्वादशाङ्गुलः इदं तु भगप्रमाणं चतुर्विधस्त्रीपरिगणित–हस्तिनी-जातिस्त्रियाः ज्ञेयम् ( सुसू. ३५.१२ ) योनि विस्तार. योनीचे छिद्र. त्याचा घेर बारा अंगुळे. हे हस्तिनी जातीच्या स्त्रीच्या योनीचे होय. स्त्रियांच्या एकंदर जाति चार.

**भगन्दर**–पु., रोग० भगस्थानस्य रोगः, भगगुदबस्तिदेशदारणाच्च भगन्दरः, अयं भगस्थानसंश्रितः पिडकारम्भो गुदभगबस्तिदारणो व्रणात्मको महाव्याधिः ( सुनि. ४.३ ) तस्याऽधिष्ठानं मांसधरा नाम त्वक् ( सुशा. ४.४ ) स्वहेतुभिः प्रकुपितो दोषः संनिवृत्तः स्थिरीभूतो गुदमभितोऽङ्गुलेद्व्यङ्गुले वा मांसशोणिते प्रदूष्य पिडकां जनयति ( सुनि. ४.५ ) पञ्च भगन्दरा भवन्ति (सुनि. ४.३)

पूर्वरूपाणि–कटिकपालवेदना–कण्डूर्दाहः शोफश्च गुदस्य; लक्षणानि–वातजभगन्दरेऽरुणवर्णाः पिडका तोदादिवेदनायुक्ता भवति। अप्रतिक्रियमाणा च पाकमुपैति मूत्राशयाऽभ्यासगतत्वाच्च व्रणः प्रक्लिन्नः शतपोनकवद् अणुमुखैश्छिद्रैराऽऽपूर्यते । तानि च्छिद्राणि चाजस्रमच्छं फेनानुविद्धमधिकमास्रावं स्रवन्ति। व्रणश्च ताड्यते भिद्यते छिद्यते सूचिभिरिव निस्तुद्यते गुदं चावदीर्यते। उपेक्षितश्च वातमूत्रपुरीषरेतसामप्यागमस्तैरेव च्छिद्रैर्भवति। तं भगन्दरं शतपोनकमित्याचक्षते। पित्तजः–पित्तं तु प्रकुपितमनिलेनाधः प्रेरितं पूर्ववदवस्थितं रक्तां तन्वीमुच्छ्रितामुष्ट्रग्रीवाकारां पिडकां जनयति।

साऽस्यशोषादीन् वेदनाविशेषान् जनयति। अप्रतिक्रियमाणा च पाकमुपैति। व्रणश्चाग्निक्षाराभ्यामिव दह्यते दुर्गन्धमुष्णमास्रावं स्रवति। उपेक्षितश्च वातमूत्रपुरीषरेतांसि जनयति। तं भगन्दरमुष्ट्रग्रीवमित्याचक्षते। कफजः–श्लेष्मा तु प्रकुपितः समीरेणाधः प्रेरितः पूर्ववदवस्थितः शुक्लावभासां स्थिरां कण्डूमतीं पिडकां जनयति।

सा कण्ड्वादीन् वेदनाविशेषान् जनयति। अप्रतीकारे सति पाकमुपैति। व्रणश्च कठिनः संरम्भीकण्डूप्रायः पिच्छिलमजस्रमास्रावं स्रवति। उपेक्षितश्च वातमूत्रपुरीषरेतांसि विसृजति, तं भगन्दरं परिस्राविणमाचक्षते। वायुः प्रकुपितः प्रकुपितौ पित्तश्लेष्माणौ परिगृह्याऽधो गतः पूर्ववदवस्थितः पादाङ्गुष्ठप्रमाणां सर्वलिङ्गां पिडकां जनयति। सा तोददाहकण्ड्वादिवेदनाविशेषान् जनयति। अप्रतिक्रियमाणा च पाकमुपैति। व्रणश्च नानाविधवर्णमास्रावं स्रवति। पूर्णनदीशम्बूकावर्तवच्चात्र समुत्तिष्ठन्ति वेदनाविशेषाः तं भगन्दरं शम्बूकावर्तमित्याचक्षते। मूढेन मांसलुब्धेन यदस्थिशल्यमन्नेन सहाभ्यवहृतं यदाऽवगाढपुरीषोन्मिश्रमपानेनाऽधः प्रेरितमसम्यगागतं गुदमपक्षिणोति, तदा तत्क्षतनिमित्तः कोथ उपजायते। तस्मिँश्च क्षते पूयरुधिरावकीर्णमांसकोथे भूमाविव जलक्लिन्नप्रक्लिन्नायां क्रिमयः संजायन्ते। ते भक्षयन्तो गुदमनेकधा पार्श्वतो दारयन्ति। तस्य तैर्मार्गैः कृमिकृतैर्वातमूत्रपुरीषरेतांस्यभिनिस्सरन्ति। तमुन्मार्गिणं भगन्दरमित्याचक्षते (सुनि. ४) वातपित्तजो भगन्दरः परिक्षेपिसंज्ञः। तत्र परिक्षेपिणि प्राकारस्य परितः परिखेव गुदं परिक्षिप्य गुदस्य परितो मण्डलाकृत्या नाडी समुपजायते। वातकफादृजुर्नामा भगन्दर उपजायते। तत्र ऋज्व्या गत्या गुदः अवदीर्यते। स्वकारणैः प्रथममुत्पन्नमर्श आश्रिताभ्यां कफपित्ताभ्यामर्शोमूले जनितः कण्डूदाहादिमान् शोफस्तन्मूलक्लेदनेन गतिभिर्नाडीभिरजस्रमविच्छेदेन पूयं स्रवति। अयमर्शोभगन्दरः (असंउ. ३३) रिष्टलक्षणानि – वातमूत्रपुपुरीषाणि क्रिमयः शुक्रमेव यस्य भगन्दरात् प्रस्रवन्ति तं परिवर्जयेत्। चिकित्सासूत्रम्–छेद्यरोगः' (सुसू. २५.३) तत्राऽग्निकर्मचिकित्सा कार्या, (सुसू. १२.१०) भगन्दरपिडका यद्यपक्वाः स्युस्तर्हि विरेचनान्तेनापतर्पणाद्येकादशप्रकारेणोपक्रमेत (सुचि. १.११) शस्त्रकर्म–तत्र भगन्दरपिडकोपद्रुतमातुरमपतर्पणादिविरेचनान्तेनैकादशविधेनोपक्रमेणोपक्रमेतापक्वपिडकं पक्वेषु चोपस्निग्धमवगाहस्विन्नं शय्यायां संनिवेश्याऽर्शसमिव यन्त्रयित्वा भगन्दरं समीक्ष्य पराचीनमवाचीनं वा, ततः प्रणिधायैषणीमुन्नम्य साशयमुद्धरेच्छस्त्रेण। अन्तर्मुखे चैवं सम्यग्यंत्रं प्रणिधाय प्रवाहमाणस्य भगन्दरमुखमाद्यैषणीं दत्त्वा शस्त्रं पातयेद् आसाद्य वाऽग्निं क्षारं चेति; एतत्सामान्यं सर्वेषु (सुचि. ८.४)

भगंदर रोग. भग म्हणजे योनि. गुदबस्ति (मूत्राशय) हा भाग ज्या विकारात फाटतो तो विकार. योनि प्रदेशात पुळी निर्माण होऊन योनी बस्ती व गुदापर्यंत त्याचा परिणाम होऊन ती फाटतात. याचे अधिष्ठान मांसधरा त्वचा आहे. प्रकुपित झालेला वायु गुदमार्गात अवरुद्ध होऊन गुदामध्ये एक किंवा दोन अंगुळे भागातील मांस व रक्त यांना बिघडवून पुळी तयार करतो. त्यांचे प्रकार पाच आहेत. **रोगाची पूर्वरूपे**—कमरेतील हाडामध्ये वेदना, गुदामध्ये खाज, दाह, सूज निर्माण होते. त्यानंतर भगंदर प्रगट होते. दोषांच्या भेदाने त्यांची लक्षणे होतात. **वातज** भगंदरामध्ये होणारी पुळी अरुण रंगाची ठणका वगैरे युक्त असते. त्याचा काहीही प्रतिकार केला नाही तर ती पिकते. त्याचा उगम किंवा वाढ मूत्राशयाशी संबंधित असल्याने त्यांतून येणारा व्रण ओलसर असतो. स्राव थांबत नाही. थांबला तरी ओलावा असतोच. चाळणीसारखी अनेक बारीक बारीक छिद्रे पडतात, त्या बारीक बारीक छिद्रातून

पातळ फेसकट बराच स्राव स्रवतो. तो व्रण ठणकतो. फुटल्यासारख्या वेदना होतात. कापल्यासारखे किंवा सुयांनी टोचते आहे, गुद फाटत आहे असे वाटते. यापेक्षा याची उपेक्षा झाली तर त्या व्रणातून मूत्र, पुरीष, शुक्राचा सुद्धा स्राव येऊ लागतो. भगंदराच्या या प्रकाराला "शतपोनक" असे म्हटले आहे. **पित्तज**–भगंदर—प्रकुपितपित्त वायूकडून खाली नेले जाऊन गुद मार्गातील मांसामध्ये लाल रंगाची पातळसर वर उठून दिसणारी उंटाच्या मानेप्रमाणे लांबट अशी पुळी निर्माण करते. त्यामुळे मुख कोरडे होणे शरीर दाह वगैरे चिन्हे होतात. प्रतिकार केला नाही तर ते लवकर पिकते, जणू काय विस्तवाने भाजले आहे किंवा क्षार लावला आहे अशी आग होते.
दुर्गंधयुक्त उष्ण स्राव येतो, याही स्थितीची उपेक्षा केली तर यामधूनहि वायु पुरीष, शुक्र यांचा स्राव येऊ लागतो. भगंदराच्या या प्रकाराला "उष्ट्रग्रीव" भगंदर असे म्हणतात.

**कफजभगंदर**—प्रकुपित झालेला कफ वायूकडून खाली नेला जाऊन गुदमार्गात पांढुरकी, स्थिर, कंडू असणारी पुळी उत्पन्न करतो. त्यावर काहीही उपचार केला नाही तर ते गळू पिकते. त्यातून खाजयुक्त घट्ट, बुळबुळीत, क्षोभयुक्त स्राव सारखा येतो. ते गळूही घट्ट असते. याचीहि उपेक्षा झाली तर त्यातून मूत्र, पुरीष, शुक्र यांचाहि स्राव सुरू होतो. भगंदराच्या या प्रकाराला 'परिस्रावी' भगंदर असे म्हटले आहे.

वरील प्रमाणे प्रकुपित वायु पित्त कफाला एकत्र गुदात आणून त्यापासून पायाच्या अंगठ्याप्रमाणे दिसणारी सर्व दोषांच्या चिन्हांनी युक्त अशी पुळी निर्माण करतो. उपेक्षा केल्यास ती पिकते, तिची उपेक्षा केली तर तिच्यातून नाना रंगाचा स्राव स्रवतो. स्रावास नदीतील शंखावरील भोवऱ्याप्रमाणे वेदना होतात. म्हणून या प्रकाराला "**शम्बूकावर्त**" असे म्हटले आहे.

मांस खाणाऱ्या खादाड माणसाने मांसाबरोबर अस्थीचा बारीकसा भाग खाल्ला व तो हाडाचा भाग गुदमार्गात घासून गेला व त्याने गुदामध्ये जखम झाली तर त्यातून पू, रक्त, मांसाचा कुजकट स्राव होतो. ओल्या किंवा पाणथळ जमिनीत कृमि व्हावे तसे त्या ठिकाणी कृमि होतात. ते कृमि तो भाग खाऊ लागतात. त्यामुळे गुदभाग फाटतो. त्यातूनही वात, मूत्र, पुरीष, शुक्र यांचा स्राव येऊ लागतो. त्या स्थितीस "**उन्मार्गी**" भगंदर असे म्हणतात.
**वातपित्तज भगंदराला "परिक्षेपी"** असे नाव आहे. यामध्ये तटाभोवती खंदक असावा त्याप्रमाणे गुदमार्ग सोडून सभोवती गोल नळीसारखी पोकळी तयार होते. वातकफज भगंदराला "ऋजु" भगंदर असे नाव आहे. यामध्ये गुदभाग फाटतो.
पित्तकफज भगंदरला "**अर्शो**" भगंदर नाव आहे. यामध्ये प्रथम कफपित्तजन्य मूळव्याध होऊन तिच्या मुळाशी खाज, दाह, इ० लक्षणयुक्त सूज येते व तिच्या मुळातून पुवाचा ओलसर स्राव सारखा येत राहातो.

**रिष्ट लक्षणे**—ज्या भगंदरातून वायु, मूत्र, पुरीष, कृमि, शुक्र, यांचा स्राव सुरू होतो ते भगंदर बरे होणार नाही.

**चिकित्सा**—हा छेद्यरोग आहे. तेथे डाग देण्याचीहि चिकित्सा करावी. ११ प्रकारची लंघन चिकित्सा करावी. परिपक्व झाल्यावर शस्त्रकर्म करावे किंवा क्षारचिकित्सा करावी.

**–चिकित्सित**–न., **अध्यायसंज्ञा०** ( सुचि. ८.१ ) या या नावाचा अध्याय आहे. या अध्यायात भगंदर विकाराचे उपचार सांगितले आहेत.

**–निदान**–न., **अध्यायसंज्ञा०** ( सुनि. ४.१ ) अध्यायाचे नाव. या अध्यायात भगंदर रोगाची कारणे व स्वरूपाचे निवेदन आहे.

**–पिडका**–स्त्री., **लक्षण० पिटिकाविशेषः, सा गूढमूला, ससंरम्भा, रुगाढ्या रूढकोपिनी भवति** ( सुचि. ८.४; असंउ. ३३ )
भगंदराचा फोड, खोल मूळ असलेला, क्षोभयुक्त भयंकर ठणका असणारा असतो.

**–यन्त्र**–न., **नाडीयन्त्र० भगयन्त्रे द्वे, एकमेकच्छिद्रमपरं द्विच्छिद्रं, तदर्शोयन्त्रमेवापनीतौष्ठम् 'मुखाच्छिद्रस्य पार्श्वभाग ओष्ठः'** ( अहसू. २५.१६-१९ )
भगंदर पाहण्यासाठीं उपयोगी पडणारे पोकळी असणारे भगंदरयन्त्र. हे दोन प्रकारचे असते. एकाला एक छिद्र असते व दुसरे २ छिद्रांचे असते. अर्शोयंत्राच्या छिद्राच्या सर्व बाजूने असलेला ओष्ठभाग वर वळवला कीं भगंदरयंत्र होते.

**भगास्थि**-न., भगस्य समंतात् स्थितमस्थि० भगास्थ्येकमेव ( चशा. ७.६ )

भगभागातील हाड, योनि जवळचे हाड. (दोन्ही बाजूचे मिळून बनलेले). हे एकच असते.

**भग्न**-न., रोग० ( सुनि. १५ ) पतनपीडनप्रहाराक्षेपणव्यालमृगदशनप्रभृतिभिरभिघातविशेषैरनेकविधम् अस्थ्नां भङ्गमुपदिशन्ति, तद् द्विविधम् संधिमुक्तं काण्डभग्नं च, तत्र षड्विधं संधिमुक्तं द्वादशविधं काण्डभग्नं च। तत्रापि संधिमुक्तमुत्पिष्टं विश्लिष्टं विवर्तितमवक्षिप्तमतिक्षिप्तं तिर्यक्क्षिप्तं च। तत्र प्रसारणाऽऽकुञ्चनविवर्तनाक्षेपणाशक्त्युग्ररुजत्वं स्पर्शासहत्वं च सामान्यं संधिमुक्तलक्षणम्। तत्रोत्पिष्टे संधावुभयतः शोफो वेदनाप्रादुर्भावो विशेषतश्च नानाप्रकारा वेदना रात्रौ प्रादुर्भवन्ति। विश्लिष्टेऽल्पः शोफो वेदनासातत्यं संधिविक्रिया च। विवर्तिते संधिपार्श्वाङ्गगमनाद्विषमाङ्गता वेदना च। अवक्षिप्ते संधिविश्लेषस्तीव्ररुजत्वं च। अतिक्षिप्ते द्वयोः संध्यस्थ्नोरतिक्रान्तता वेदना च। तिर्यक्क्षिप्ते एकास्थिपार्श्वापगमनमत्यर्थं वेदना च। काण्डभग्नस्य भेदाः— कर्कटकमश्वकर्णचूर्णितं पिच्चितमस्थिच्छल्लितं काण्डभग्नं मज्जानुगतमतिपातितं वक्रं छिन्नं पाटितं स्फुटितं च; तत्र श्वयथुबाहुल्यं स्पन्दनविवर्तनस्पर्शासहत्वमत्रपीड्यमाने शब्दः स्रस्ताङ्गता विविधवेदनाप्रादुर्भावः सर्वास्ववस्थासु न शर्मलाभ इति समासेन काण्डभग्नलक्षणम्। विशेषतस्तु संमूढमुभयतोऽस्थिमध्ये भग्नं ग्रन्थिरिवोन्नतं कर्कटकम्। अश्वकर्णवदुद्गतमश्वकर्णम्। स्पृश्यमानं शब्दवच्चूर्णितम्। पिच्चितं पृथुतां गतमनल्पशोफम्। पार्श्वयोरस्थिहीनोद्गतमस्थिच्छल्लितम्। वेल्लते प्रकम्पमानं काण्डभग्नम्। अस्थ्यवयवोऽस्थिमध्यमनुप्रविश्य मज्जानमुन्नह्यतीति मज्जानुगतम्। अस्थिनिःशेषतश्छिन्नमतिपातितम्। आभुग्नमविमुक्तास्थि वक्रम्। अन्यतरपार्श्वाऽवशिष्टं छिन्नम्। पाटितमणुबहुविदारितं वेदनावच्च शूकपूर्णमिवाध्मातं विपुलं स्फुटितमिति। तेषु स्फुटितं चूर्णितच्छिन्नाऽनुपातितमज्जानुगतानि कृच्छ्रसाध्यानि कृशवृद्धबालानां क्षतक्षीणकुष्ठिश्वासिनां सन्ध्युपगतं चेति। रिष्टलक्षणम्—भिन्नं कपालं कट्यां संधिमुक्तं च्युतं जघनं पिष्टमसंश्लिष्टं कपालं ललाटे चूर्णितं स्तनान्तरे भग्नं शङ्खे पृष्ठे मूर्धनि विवर्जयेत् ( सुनि. १५ ) अल्पाशिनोऽनात्मवतः सोपद्रवस्य वातप्रकृतेर्भग्नं कृच्छ्रेण सिध्यति ( सुचि. ३.३ ) चिकित्सा– शरीरे चलानचलानपि संधीन् आञ्छनैः पीडनैः संक्षेपैर्बन्धनैर्वा स्थापयेत् ( सुचि. ३.१८-१९ ) उत्पिष्टं विश्लिष्टं संधिं न चालयेत्। शीतान् परिषेकान् प्रदेहाँश्चावचारयेत्। अभिघाते हृते सति संधिं प्रकृतिमापन्नं घृतदिग्धेन पट्टेन वेष्टयित्वा पट्टोपरि कुशान् दत्त्वा बन्धमाचरेत् ( सुचि. ३.२०-२२ ) अङ्गुलिभग्नचिकित्सा–भग्नां संधिमुक्तां वाऽङ्गुलिं समां स्थापयित्वाऽणुपट्टेनाऽऽवेष्ट्य घृतसेकं प्रदापयेत् ( सुचि. ३.२४ ) तलभग्नचिकित्सा– कुशोत्तरं पादतलभग्नं सर्पिषाऽभ्यज्य वस्त्रपट्टेन बध्नीयात्। व्यायामं च नाऽऽचरेत् ( सुचि. ३.२५ ) जङ्घोरूभग्नचिकित्सा–जङ्घामूरूमायम्याऽभ्यज्य शीतवृक्षत्वचो दत्त्वा वस्त्रपट्टेन वेष्टयेत्, जङ्घोरूभग्नानां कपाटशयनं हितम् ( सुचि. ३.२६ ) ऊर्वस्थिनिर्गमनचिकित्सा– चक्रयोगेन निर्गतमूर्वस्थि आञ्छेत्। पूर्ववद्बध्नीयात् ( सुचि. ३.२७ ) कटिभग्नचिकित्सा– ऊर्ध्वगतमस्थि बध्नीयादधः कृत्वाऽधो गतमूर्ध्वं कृत्वा बध्नीयात्। अनन्तरं स्नेहबस्तिभिरुपाचरेत् ( सुचि. ३.२८ ) पर्शुकाभग्नचिकित्सा– घृताभ्यक्तस्य तिष्ठतः कवलिकां दत्त्वा दक्षिणासु अथवा वामासु निबन्धनीर्वेष्टयेत्। अनन्तरं तैलपूर्णे कटाहे द्रोण्यां वा शाययेत् ( सुचि. ३.२९-३० ) स्कन्धभग्नचिकित्सा– विसंहतस्कन्धं मुसलेनोत्क्षिप्य प्रकृतौ स्थापयित्वा स्वस्तिकबन्धविशेषेण बध्नीयात्। कूर्परसंधिभग्नचिकित्सा– कौर्परसंधिमङ्गुष्ठेनानुमार्जयेत् पीडयेच्च, प्रसार्याकुञ्चयेत् स्नेहसेकं च दापयेत्। जानुनि गुल्फ मणिबन्धे भग्ने सति च विधिरयं कार्यः ( सुचि. ३.३२-३३ ) हस्ततलभग्नचिकित्सा– तलभग्नस्योभयतले समे कृत्वा बध्नीयात् आमतैलेन परिषेकं कारयेत्। अनन्तरं हस्ततले पूर्वं मृत्पिण्डमनन्तरं लवणं च धारयेत् जातबले हस्ते तु पाषाणधारणं कुर्यात्। ( सुचि. ३.३४-३५ ) अक्षकभग्नचिकित्सा–अधः प्रविष्टं मुसलेनोन्नमयेत्। स्विन्नमुन्नतं मुसलेनाधः पीडयेत्। अनन्तरं गाढमेव बध्नीयात्। बाहुभग्ने–ऊरुभग्नवच्चिकित्सा– कर्तव्या (सुचि. ३.३६-३७) वक्राया ग्रीवाया हन्वोश्च गृहीत्वोन्नमयेत् कुशां

**समां दत्त्वा नातिगाढं नातिशिथिलं वेष्टयेत्** ( सुचि. ३.३७-३८ ) **हनुभग्नचिकित्सा–विसंहते हनुसंधौ हन्वस्थीनि समानीय स्वेदयित्वा सम्यक् स्थितेषु तेषु पञ्चाङ्गी वितरेत् । अनन्तरं वातघ्नमधुरैः सिद्धं सर्पिर्नस्यार्थे उपयोजयेत् । दन्तभग्नचिकित्सा–तरुणस्य सरक्तानभग्नाँश्चलितान् दन्तानवपीडयेत् । बहिः शीतैरालेपयेत् । अम्बुभिः सिक्त्वा शीतैः संधानीयैरुपाचरेत् । उत्पलनालेन क्षीरपानं कुर्यात्, वृद्धस्य चलितान् दन्तान् वर्जयेत् । नासाभग्नचिकित्सा–अभिघातेनान्तःप्रविष्टां नासां शलाकयोन्नम्य वक्राम् ऋजूकृत्य पृथङ्नासिकयोर्नाड्यौ द्विमुख्यौ संप्रवेशयेत् । ततः पट्टेन संवेष्ट्य घृतसेकं कुर्वीत** ( सुचि. ३.४३-४४ ) **कर्णभग्नचिकित्सा–भग्नं कर्णं घृतप्लुतं समं कृत्वा बध्नीयात् पश्चात् सद्यःक्षतविधानं कुर्यात्** ( सुचि. ३.४५ ) **कपालभग्नचिकित्सा–मस्तुलुङ्गाद्विना भिन्ने कपाले मधुसर्पिषी दत्त्वा निबध्नीयात् । ततः सप्ताहं घृतं पिबेत्** (सुचि. ३.४६) **ऊर्ध्वकाये भग्नानां शिरोबस्तिः कर्णपूरणं च हितम्, घृतपानं नस्यं च हितम्; प्रशाखास्वनुवासनम्** ( सुचि. ३.५४ ) **गयी; सम्यग्रूढलक्षणानि– अनाकुलमनुन्नतं सुखेनाऽऽकुञ्चनप्रसारणादिकम्** ( सुचि. ३.७० ) **भग्ने पाकः कृच्छ्रसाध्यस्य लक्षणम्** ( सुचि. ३.६९ )

एक प्रकारचा रोग. पडण्यामुळे, दाबल्यामुळे, मार लागल्यामुळे, ओढल्यामुळे, वाघासारख्या हिंस्र प्राण्यांचा चावा इत्यादिकांमुळे, विशिष्ट प्रकारची इजा झाल्यामुळे, हाड मोडण्याचे अनेक प्रकार संभवतात. ते मुख्य दोन प्रकारचे. सन्धि निखळणे व लांब हाडे मोडणे; संधि निखळणे सहा प्रकारचे व हाड मोडणे बारा प्रकारचे. सन्धि निखळण्याचे प्रकार [ १ ] उत्पिष्ट सान्ध्याची निखळलेली हाडे एकमेकांना घासणे. [ २ ] विश्लिष्ट निखळून बाजूला झालेला. [ ३ ] विवर्तित निखळून पिरगळला गेलेला. [ ४ ] अवक्षिप्त खाली गेलेला. [ ५ ] अतिक्षिप्त सान्ध्याची हाडे एकमेकांपासून खूप दूर झालेला. [ ६ ] तिर्यक्क्षिप्त तिरका सुटलेला. **सामान्य सन्धि मुक्त लक्षणे**— पुढे करणे, जवळ आणणे, वळवणे, ओढणे ह्या क्रिया करायला शक्ति नसणे, अत्यन्त वेदना होणे व स्पर्श सहन न होणे. **उत्पिष्ट सन्धि मुक्त लक्षणे**— सान्ध्याला दोन्ही बाजूंनी सूज, वेदना होणे आणि विशेषतः रात्री विविध प्रकारच्या वेदना होणे. **विश्लिष्ट** प्रकारात–किंचित् सूज, सतत वेदना व सांध्यांची कोणत्याही प्रकारची हालचाल न करता येणे ही लक्षणे होतात. **विवर्तित** प्रकारात–संधी बाजूला गेल्यामुळे संधी विषम म्हणजे वर खाली होणे आणि वेदना होणे ही लक्षणे होतात. **अवक्षिप्त** प्रकारात–संधि निखळणे आणि अतिशय वेदना होणे ही लक्षणे होतात. **अतिक्षिप्त** प्रकारात–संधीची हाडे एकमेकांपासून दूर फेकली जाणे ब वेदना ही लक्षणे होतात. **तिर्यक्क्षिप्त** प्रकारात–एक हाड बाजूला खाली जाणे व अतिशय वेदना ही लक्षणे होतात. **हाड मोडण्याचे प्रकार १२.** ते खालील प्रमाणे **कर्कटक**–हाडाच्या मध्यभागी मोडून हाड कर्कटक म्हणजे ग्रंथीप्रमाणे वर येणे व दोन्ही बाजूला स्पर्श मुळीच सहन न होणे. **अश्वकर्ण**–घोड्याच्या कानाप्रमाणे हाड वर निघून येणे. **चूर्णित**–स्पर्श केला असता चुरल्यासारखा आवाज ज्यात निघतो ते चूर्णित. **पिच्चित**–पिचून सपाट झालेले व खूप सूज ज्यात आहे असे. **अस्थिच्छलित**–हाड मोडून ज्यात दोन्ही बाजूनी पाहिले असतां एक हाड खाली व एक हाड वर असे दिसते. **काण्डभग्न**–ज्यात हाडाचे दोन तुकडे होऊन ते लोंबते व थरथर कापते–**मज्जानुगत.** ज्यात मोडलेल्या हाडाचा एक भाग अस्थीमध्ये असलेल्या पोकळीत शिरून, मजेत जाऊन मज्जा वर आणतो ते. **अतिपातित**–ज्यात हाडाचे पूर्णपणे तुकडे होऊन एकमेकापासून दूर गेलेले असतात, ते. **वक्र**–ज्यात दोन तुकडे न होता हाड वाकते. **छिन्न**–पूर्णपणे न मोडलेले एका बाजूचे शाबूत असणे. **पाटित**–ज्यात लहानलहान पुष्कळ तुकडे होतात व वेदना होते ते. **स्फुटित**–कुसळ भरल्याप्रमाणे ज्यात वेदना आहेत व सुजलेले आहे व हाड पुष्कळ फुटलेले आहे ते. **भग्नाची सामान्य लक्षणे**–अतिशय सूज, हाड थर थर कापणे, वळणे, स्पर्श सहन न होणे, दाबले असता आवाज येणे, अवयव ढळणे, निरनिराळ्या वेदना होणे, कोणत्याही अवस्थेत चैन न पडणे ही होत. ह्या भग्नप्रकारांपैकी चूर्णित, छिन्न, अनुपतित, मज्जानुगत हे प्रकार कृश, वृद्ध, बाल, क्षतामुळे क्षीण झालेले कोडी व दमा असलेले ह्यांच्यामध्ये कष्टाने बरे होणारे आहेत.

तसेच संधि जवळ मोडलेले हाड देखील कष्टाने बरे होणारे आहे. **रिष्टलक्षणे**–कमरेमध्ये फुटलेली पसरट हाडे, तसेच सन्धीपासून सुटलेले किंवा ढळलेले, जांघेमध्ये तिंबत्यासारखे होऊन, तुकडे झालेले, त्याची चिकित्सा करू नये. फुटलेले पसरट हाड त्याचे ते दोन्ही भाग एकमेकाशी नीट न जुळले, कपाळाच्या हाडाचे चूर्ण झाले, स्तनामध्ये, कानशीळेतले, डोक्यातले, पाठीतले हाड फुटले तर त्याची चिकित्सा करू नये. प्रथमपासूनच नीट रीतीने हाड किंवा सांधा नीट जुळला नाही तर तो भग्न असाध्य आहे. सांधा किंवा हाड व्यवस्थित जुळवले तरी नंतर नीट ठेवला नाही, पट्टा नीट बांधला नाही, धक्का लागला, हालचाल जास्त झाली आणि त्यामुळे जर विकृती झाली तरी त्याची चिकित्सा करू नये. कमी खाणारा, मन ताब्यात न ठेवणारा, उपद्रव झालेला, वातप्रकृतीच्याचा भंग कष्टाने साध्य होतो. **उपचार**– शरीरातील चल किंवा अचल सन्धींना ते मोडल्यानंतर आखूड असतील, तर लांब करून खाली गेला असेल तर वर करून, वर चढला असेल तर खाली ओढून इत्यादी त्या स्थितीला अनुसरून व्यवस्थित दाबून, योग्य त्या बन्धनांनी बांधून ठेवावा. हाडाचा चुरा झाला असेल आणि निखळून बाजूला झाला असेल तर ते हाड हालवू नये. आणि ताबडतोब थंड पाणी शिंपडावे किंवा धार धरावी व थंड लेप द्यावे. आघाताने संधि ढळला तर तो संधि किंवा हाड नीट जुळवून तुपात पट्टा भिजवून त्याने वेष्टून, त्या पट्ट्यावर कास (दर्भाची जात) ठेवावे आणि बांधावे. **विभागशः चिकित्सा**–फुटलेली किंवा सुटलेली अंगुळी जुळवून बारीक पट्ट्याने बांधून तूप शिंपावें. **पायाच्या तळव्यात** हाड मोडले असल्यास त्यावर तूप चोळून दर्भ ठेवावे व कापडाचा पट्टा बांधावा. हालचाल करू नये. **जांघेचे किंवा मांडीचे हाड** मोडले असता ते ताणून तुपाने चांगले चोळून वडासारख्या शीतवृक्षाची त्वचा त्यावर गुंडाळून कापडी पट्टा बांधावा. **जंघा** (पोटरी) व मांडी ह्यांची हाडे मोडली असता त्यांभोवती विधियुक्त फळ्या बांधणे हितकर आहे. **मांडीचे हाड निखळले** असता ते योग्य दिशेने फिरवून ओढावे व बसवावे आणि कुशाने पूर्वीप्रमाणे बांधावे. **कमरेचे हाड मोडले** असता ते जर वर गेले असेल तर खाली करून बांधावे व खाली गेले असेल तर वर करून बांधावे. नंतर स्नेहबस्ती द्यावा. **फासळी मोडली** असता तुपाने चोळून कापसाची चकती ठेवावी व उजव्या किंवा डाव्या बाजूला पट्टी बांधावी. नंतर तेल भरलेल्या कढईत किंवा डोणीत त्याला निजवावे. **खांदा मोडला** असता विस्कळीत झालेला खांदा काखेत मुसळ घालून वर ढकलून त्याच्या स्वाभाविक अवस्थेत ठेवावा आणि स्वस्तिक-बन्धाने बांधावे. **कोपराचा सन्धि मोडला** असता अंगठ्याने खालून वर चोळावा व दाबावा. लांब करून पुन्हा आखूड करावा आणि स्नेहन करावे व शेकावे. **गुडघा घुटणा व मनगट** येथली हाडे मोडली असता हाच उपचार करावा. **हाताच्या तळव्याचे हाड** मोडले असता तळव्याच्या दोन्ही बाजू (मागची व पुढची) सारख्या करून तळवा बांधावा व कच्चे तेल शिंपावे. नंतर हाताच्या तळव्यावर अगोदर मातीचा गोळा व त्यानंतर मीठ (सैंधव) धरावे. हाताला बळ आल्यानंतर हातात दगड धरावा. **गळसरीचे हाड** मोडले असता – ते जर खाली गेले असेल तर मुसळाने वर उचलावे. वर झाले असता शेक करून मुसळाने खाली दाबावे व नंतर घट्ट असे बांधावे. **बाहूचे हाड** मोडले असता– मांडीचे हाड मोडले असता करावयाचे उपचार करावे. **मान वाकडी असता** मानेच्या मागील उंच हाड व हनुवटी धरून वर करावी. सारखे दर्भ त्यावर गुंडाळून फार घट्ट नाही व फार ढिले नाही असे बांधावे. **हनुवटीचे हाड** निखळले असता– निखळलेला भाग डावीकडे गेलेला असेल तर उजवीकडे दाबून किंवा उजवीकडे गेलेला असेल तर डावीकडे दाबून नेहमीच्या स्थितीत आणून पञ्चांगी नावाच्या बंधाने बांधावे. नंतर नाकात घालण्यासाठी वातघ्न व मधुर द्रव्यांनी सिद्ध असे तूप उपयोगात आणावे. **तरुण माणसाचे दात** मुळातून निघाले नसतील, ते हालत असतील, रक्त येत असेल तर ते दाबून नीट बसवावे व बाहेरच्या बाजूने थंड पाणी शिंपडावे व थंड द्रव्यांचा लेप द्यावा. तसेच सन्धानीय द्रव्यांचा उपयोग करावा. कमळाच्या नाळाने दूध पाजावे. **म्हाताऱ्या माणसाचे दात हालत** असल्यास त्यांची चिकित्सा करू नये. **नाकाचे हाड** मार लागून आत गेले असल्यास सळईने वर करून, वाकडे

भुंग्यांना आकर्षक पण त्यांना मारणारी अतिगंध असणारी वनस्पती.

**-मूलिका**-स्त्री., वनस्पति० **भृङ्गाह्वा** ( रापरि. ७.२० ) एक वनस्पती.

**-मोहिन्**-पु., वनस्पति० **चम्पकः** ( रा. १०.२३८ ) चाफा.

**-रज**-पु., वनस्पति० **भृङ्गराजः** ( ध ४.११ ) माका.

**-रस**-पु., **मार्कवस्वरसः**- (सुक.८.५६) माक्याचा रस.

**-राज**-पु., वनस्पति० **गुणाः-तिक्तोष्णः रूक्षश्चक्षुष्यः केशरञ्जनः कफघ्नः शोफामपाण्डुहृद्रोगविषघ्नश्च** ( ध. ४.११ )

हिं.—भुंग्रा मोच्रन्द.

**म.— माका.**

गु.—भांग्रा; मार्कव.

बं.—केसूरिया; केसुती.

ता.—कैकेशी.

माका. **गुण**—कडु, उष्ण, रुक्ष, डोळ्याला हितकर, केश रंगविणारा, कफनाशक, सूज, आम, पांडू, हृद्रोग व विषनाशक.

**प्रतुदपक्षि० भ्रमरवर्णः** (चसू. २७.५० )

**आनूपदेशे वर्तमानः पक्षिविशेषः भ्रमरः**(चक.१.८)

**सविषान्नं दृष्ट्वाऽयं कूजति** ( असंसू. ८ )

आनूपदेशात असणाऱ्या प्रतुदपक्ष्यापैकी एक. विषारी अन्न पाहिल्यानंतर हा पक्षी घूघू आवाज करतो.

**-राजतैल**-न., **श्वासकासविनाशि तैलम्, तदिदं भृंगराजस्य दशगुणे शुभे रसे सिद्धं भवति समूचितविचारणात्स्नेहमच्छपानं वा योजयेत्** (सुउ.५१.३०) माक्याच्या साह्याने तयार केलेले तेल. श्वास, खोकला, नाशक तेल. दहापट रसात करतात. हे प्यावयास किंवा इतर पदार्थांबरोबर द्यावे.

**-राजमुखयन्त्र**-न., **स्वस्तिकयन्त्र० अस्थिविदष्टशल्योद्धरणार्थमुपदिष्टम्** ( सुसू. ७.१० ) स्वस्तिकयन्त्रापैकी एक. हे हाडात रुतलेले शल्य काढण्याकरिता सांगितले आहे.

**-रेणु**-पु., वनस्पति० **भृंगराजः** (ध. ४.११) माका.

**-वल्लभ**-पु., वनस्पति० **धाराकदम्बः** (रा. ९.१७२) गोरखमुंडी.

**भूमिकदम्बः** ( रा. ९.१७४ ) मुंडी, गोखरमुंडी.

**-( वल्लभा )**-स्त्री., वनस्पति० **भूमिजम्बूः** (रा. ११.१३४) भुईजांभूळ, अगदी बारीक जांभूळ, **तरणी** (रा. १०.२४४) शेवंती.



**-वृक्ष**-पु., **वातहरबिल्वादिवृक्षः** (सुउ. ३५.४ ड. ) वेल इ० झाडे, वातहारक.

**भृङ्गाङ्गी**-स्त्री., वनस्पति० **लवङ्गम्** (रा. १२.८५) लवंग.

**भृङ्गानन्दा**-स्त्री., वनस्पति० **यूथिका** ( रा. १०.२५० ) जाई.

**भृङ्गाभीष्ट**-पु., वनस्पति० **आम्रः** (रा. ११.२) आंबा.

**भृङ्गार**-पु., वनस्पति० **भृङ्गराजः** ( ध. ४.११ ) माका.

**लवङ्गम्** ( ध. ३.४१ ) लवंग.

न., **सुवर्णपात्रम्, भद्रपात्रम्** (चसू. १५.७) सोन्याचे भांडे, पवित्र भांडे.

**भृङ्गारक**-पु., वनस्पति० **भृङ्गराजः** ( ध. ४.११ ) माका.

**भृङ्गारि**-स्त्री., वनस्पति० **भ्रमरारिः** ( रापरि. १०.४१ ) एक वनस्पती. माळव्यात प्रसिद्ध.

**केविका** ( रापरि. १०.३३ ) एक सुगंधी वनस्पती.

**भृङ्गाह्व**-पु., वनस्पति० **भृङ्गराजः** ( रा. ४.२० ) माका.

**(भृङ्गाह्वा)**-स्त्री., वनस्पति० **गुणाः- कटुस्तिक्तोष्णा दीपनरोचनी च** ( रापरि. ७.२० )

एक वनस्पती. तिखट, कडु, उष्ण, दीपक, रुचकर.

**भृङ्गिन्**-पु., वनस्पति० **भृङ्गराजः** ( र. २४.८५ ) माका.

**रसमण्डपे पूजनीयो देवता०** ( र. ६.२५ )

पारदौषधि निर्मितिस्थानात पूजा करण्याची देवता, शंकर वगैरे.

**भृङ्गेष्टा**-स्त्री., वनस्पति० **काकजम्बूः** ( रा. ११.१३२ ) लहान जांभूळ.

**कुमारी** ( रापरि. ५.११ ) कोरफड.

**तरणी** ( रा. १०.२४४ ) तरणी; शेवंती.

**भृत**-वि., **भटित्रीकृतम् मांसम्** ( चसू. १३.८६ ) सळईवर भाजलेले मांस.

**भृतिक**-पु., वनस्पति० **भूतृणः** (ध. ४.४७) रोहिस गवत.

**भृशम्**-( अव्य ) **अत्यन्तम्** (सुचि. ८.८) अत्यन्त, पुष्कळ.

**(भृश)-दुर्ग**-न., **प्रतिवादिनोऽविदितत्वेन दुर्गमिव दुर्गम् (प्रकरणम्)** ( चवि. ८.९५ )

प्रतिवादीला माहित नसल्यामुळे वादीचे विधान किल्ल्यासारखे प्रवेशास कठीण.

**-पत्रिका**-स्त्री., वनस्पति० **महानीली** (रा. ४.३५३) निळी गोकर्णी.

**-वातल**-वि., **अतिवातकृत्** ( अहसू. ६.१२७ ) अतीशय वातकारक.

**-स्निग्ध**-वि., **अतिशयेन स्निग्धः** ( सुचि. ३१.५४ ) अतीशय स्निग्ध.

**भृष्ट**–वि., **भर्जितम्** ( सुसू. ४६.३४८ ) भाजलेले.

**–तण्डुल**–पु., **भर्जिततण्डुलः, गुणाः–लघुः सुगन्धिः कफहा च** ( ४६.३४८ )
भाजलेले तांदूळ, **गुण**—हलके, सुगंधी, कफनाशक.

**–मृद्**–स्त्री., **दग्धमृत्तिका** ( चसू. ४.१५ )
भाजलेली माती.

**–यन्त्र**–न., **तिर्यगाकारचुल्ल्यां तिर्यङ्मुखं घटं स्थापयित्वा मुखं विहाय सर्वो घटो विलिप्यते, तस्मिँश्च नागभस्म विधीयते, एतदेव भृष्टयन्त्रम्** ( र. ५.१८१ )
खापर, भाजण्याचे मडके. तिरप्या चुलीवर मडके तिरके ठेवून, तोंड सोडून, बाकीचे मातीने लिंपावे व त्यात नागभस्म करावे.

**भेक**–पु., **भूमिशयप्राणि० मण्डूकः** ( चसू. २७.३८ )
**बिलेशयानामहिततमः** ( चसू. २५.३९ )
बेडूक; बिळातल्या प्राण्यात अगदी वाईट.

**–वर्ण**–वि., **भेकस्य वर्ण इव वर्णो यस्य सः** ( चचि. १६.३५ ) बेडकाचे वर्णाचा.

**भेड**–पु., **ऋषि० पुनर्वसोरात्रेयस्य शिष्यः भेडसंहिताकारः** ( चसू. १.३१ )
भेड नावाचे ऋषि, पुनर्वसु आत्रेयांचे शिष्य. भेडसंहितेचा कर्ता.
**पशु० मांसगुणाः– मधुरं शीतं गुरु विष्टम्भि बृंहणं सर्वदोषकरम्** ( रा. ६.३८८ )
एडका. मेंढा. त्याचे मांस. **गुण**—मधुर, शीत, पचनास जड, मलावष्टंभि, पुष्टिकर, सर्वदोषकारक.

**( भेडा )**–स्त्री., **वनस्पति० पद्मबीजम्** ( ध. ४.१५९ )
कमळबीज.
**फञ्जादिशाकवर्गे शाकः** ( रापरि. ७.९५ )
भारंगमूळ. भाजीच्या वर्गातील एक भाजी, भारंगमूळ इत्यादींचा गण.

**भेण्डा**–स्त्री., **वनस्पति० गुणाः– अम्लोष्णा ग्रहिका रुचिकारिका च** ( रापरि. ४.३३७ )
हिं.—लोटलोटी, कुंजिया.
**म.—वनभेण्डा, रानतुपकाडा, वागडु भेण्डी.**
बं.—बेन ओचरा.
हाताच्या पंजासारखी पाने, गोल बियांची, आंबट पानाची वनस्पती. भेंडीची जात. रानभेंडी. **गुण**—आंबट, उष्ण, रुचकर, मळ बांधणारी.

**भेत्तृ**–वि., **विभागकर्ता ( पुरुषः )** ( चवि. ६.४ )
विभाग करणारा.

**भेद**–पु., **वेदना० भिद्यमानत्व इव पीडा** (चवि. २८.२०)
फोडल्यासारखी वेदना.
**भेदनम्, वायोरेकं वैकृतं कर्म** (चसू. २०.१२)
भेदून जणू काय दोन तुकडे होतात अशी वेदना. दुष्ट वाताचे एक कर्म.
**स्फोटनम्** ( सुउ. ३९.८७ ) फोडणे.
**विरेचनम्** ( र. १९.४-६ ) रेच.
**क्षणनम्** ( सुउ. ४५.९ ) बारीक बारीक तुकडे होणे.
**कुठारेण विदारणवद् वेदनाविशेषः** ( सुनि. ११.४ )
कुऱ्हाडीने घाव घालून दोन तुकडे करण्यासारखी वेदना.
**विशेष, प्रकारः** ( चक. १.३ ) विशेषप्रकार.
**सर्गः, श्लथप्रवृत्तिः** ( चसू. २८.२२ )
उत्पत्ति, सैल होण्याचा स्वभाव.
**विकृतिः** ( चचि. ११.६१ ) विकृति, बदल.

**–प्रकृति**–स्त्री., **भेदकारणम्** ( चवि. ६.४ )
भेदाचे कारण.

**–प्रकृत्यन्तरीय**–वि., **भेदकारणान्तरभवम्** ( चवि. ६.४ ) भेदाखेरीज अन्य कारणाने झालेले.

**भेदाग्र**–न., **भेदानां परिमाणं संख्या इति यावत्** ( चवि. ६.४ )
भेदांचे परिमाण, प्रकारांची संख्या इत्यादींचे मोजमाप.

**भेदक**–पु., **वनस्पति० अम्लवेतसः** (ध.२.९६) अम्लवेतस.

**भेदन**–न., **वनस्पति० हिङ्गुः** ( रा. ६.६० ) हिंग.
**सूक्तम्** ( ध. ६. २४६ ) आंबवलेले.
**अम्लवेतसः** ( रा. ६.१४७ ) अम्लवेतस.
**उपक्रम० आशयविदारणम्** ( चसू. ११.१५ )
आशय फोडणे, चिरणे.
**भेदनवद् वेदना** ( अहृसू. १२.४९ )
भेद केल्यासारखी वेदना. फोडल्यासारखी वेदना, फूट.
**त्वग्विदारणमिव वेदना** ( सुसू. २२.११ )
त्वचा फाटल्यासारखी वेदना.
**वृध्दिपत्रादिभिः शस्त्रैः स्फोटनम्** ( सुसू. २७.४ )
चाकू सुरी इत्यादी शस्त्राने कापणे.

**भेदनीय**–वि., **भेदनाय हितम्** ( चसू. ४.८ ) **महाकषायवर्गे एको गणः** (चसू. ४.९) **सुवहाऽका-**

रुबकाऽग्निमुखीचित्राचित्रकचिरबिल्वशङ्खिनी-शकुलादनीस्वर्णक्षीरिण्य इति ( चसू. ४.९ )
मळ फोडण्याच्या कामी हितकर, महाकषायवर्गाचा एक गण-तेड, रुई, एरंड, कळलावी, दांतीमूळ, चित्रक, करंज, सांखवेल, कुटकी, पिवळा धोतरा.

**भेदाशिन्**-पु., प्रतुदपक्षि०
भक्ष्याला टोचून टोचून खाणारा पक्षी.
**गुणाः-सर्वदोषकरो मलदूषकश्च**
( सुसू. ४६.६९ )
**गुण**—सर्व दोष करणारा, मळ दुष्ट करणारा.

**भेदिन्**-पु., वनस्पति० अम्लवेतसः ( रा. ६.१४७ )
अम्लवेतस.
जयपालः ( र. २०.२६ ) जयपाळ.
**रन्ध्रकरः पारदस्य कञ्चुकाख्यो दोषः** (र. ११.२२)
पाऱ्याच्या सात कंचुकांपैकी एक दोष. छिद्र करणारी.

**(भेदिनी)**-स्त्री., वनस्पति० कृष्णजीरकः (रा. ६.१०४)
काळे जिरे.

**भेद्य**-वि., विभाज्यो ( विषयः ) ( चवि. ६.४ )
दोन भाग करणारा.
**अष्टविधशस्त्रकर्मस्वेकम्** ( सुसू. ५.५ )
आठ प्रकारच्या शस्त्रकर्मांपैकी एक.
**-योग्या**-स्त्री., भेदनकर्माभ्यासः ( सुसू. ९.४ )
भेदनकर्माचा अभ्यास.
**-रोगप्रतिषेध**-पु., अध्यायसंज्ञा० ( सुउ. १४.१ )
अध्यायाचे नाव.

**भेरी**-स्त्री., वाद्य० दुन्दुभिः ( चइ. १२.७९ )
नौबत-नगारा.

**भेल**-पु., ऋषि० ( कासिद्धि. १) भेल नांवाचे ऋषि.
**पुनर्वसोरात्रेयस्य शिष्यः, तन्त्रकर्ता** ( चसू. १.३३ )
पुनर्वसु आत्रेयाचे शिष्य. ग्रन्थकर्ता.

**भेषज**-न., औषधम्, रोगनिवारकं द्रव्यम् (चसू. १.६२)
' भिषग्विज्ञाननेयत्वाद्भेषजं भिषजो विदुः '
( काखिल. ३.२८ )
औषध, रोगनिवारक द्रव्य. भिषगाने (वैद्याने) जाणण्यासारखे ते.
**-चिकित्सा**- ( चसू. १०.३ )
औषधयोजना, उपचार.
**-क्षपित**-वि., शोधनकर्शितः ( अहसू. ४.२८ )
शोधनाने कर्षण झालेला, कृश झालेला.
**-योग**-पु., औषधस्य तदर्थसंपादनसामर्थ्यम्
( अहसू. १.२४ )
इष्ट कार्यकारी असा औषधाचा योग्य उपयोग.
**-विकारयुक्ति**-स्त्री., भेषजस्य विकारेण समं युक्तिः
( चइ. १.३ )
विकाराचा बारकावा लक्षात घेऊन औषध योजणे.
**-संवृत्ति**-स्त्री., भेषजस्य संपादनम् ( चइ. १.३ )
औषध प्राप्त करणे.

**भेषजचतुष्क**-न., चरकसूत्रस्थानस्य प्रथमे चत्वारो ऽध्यायाः (चचि. ३.२१५)
या नांवाचे चरकसूत्रस्थानाचे चार अध्याय.

**भेषजागार**-न., भेषजसंग्रहस्थानम् ( सुसू. ३६.१७ )
औषध ठेवण्याचे ठिकाण.

**भेषजापमानिन्**-वि., भेषजद्वेषी ( सुचि. ३०.४ )
औषधद्वेषी.

**भैक्षचर्यार्थ**-न., भिक्षावृत्त्यर्थम् ( चशा. ५.१२ )
भिक्षावृत्तीकरिता, भिक्षा मागून पोट भरण्यासाठी.

**भैरव**-वि., भयानकम् ( चवि. ८.११९ ) भयंकर.
पु., **रसरत्नसमुच्चयकर्ता सिंहगुप्तसूनुना यस्य तंत्रं आलोचितं तस्य कर्ता** ( र. १.५-९ )
भैरवनामक रसशास्त्र ग्रंथकर्ता. रसरत्नसमुच्चय ग्रंथाचा कर्ता सिंहगुप्ताचा पुत्र जो वाग्भट त्याने याचा ग्रंथ अवलोकन केला.
श्रीशङ्करकिङ्करभेदः ( र. ७.२३-२४ )
शंकर, किंकर हे भैरवाचे भेद आहेत.

**भैरवानन्दयोगिन्**-पु., प्राचीनो रसाचार्यः
( र. १६.१३०-३५ ) प्राचीन रसशास्त्री.

**भैषज्य**-न., भेषजमेव भैषज्यम्, औषधम् (चसू. १.१३४)
औषधालाच भैषज्य म्हटले आहे.
**-कर्शित**-वि., औषधैः कृशत्वं प्राप्तः (अहसू. १४.८)
ओषधाने कृशत्व प्राप्त झालेला.
**-काल**-पु., भैषज्यावचारणोचितः (चचि. ३०.२९८)
औषध घेण्याचा काल.
**-मात्रा**-स्त्री., औषधमात्रा ( अहसू. १८.१५ )
द्र० 'औषध' औषधाचे प्रमाण.

**भैषज्यागार**-न., भैषज्यसंग्रहस्थानम् ( असंसू. ८. )
औषधे ठेवण्याचे ठिकाण.

**भोग**-पु., सर्पस्य फणा ( चचि. २३.१३० )
सापाची फणा.

**(भोगी)**-स्त्री., वनस्पति० सर्पिणी ( रापरि. ५.३९ )
सर्पिणी, सापसंद.

**भोगिन्**–पु., सर्पः ( सुक. ३.३९ ) सर्प.

**–वती**–स्त्री., वनस्पति० समङ्गा ( असंउ. ४० इन्दु ) मंजिष्ठा, चिकणा.

**भोगिगन्धिका**–स्त्री., वनस्पति० नाकुली ( ध. ४.१०३ ) मुंगुसवेल.

**भोगिवल्लभ**–न., वनस्पति० चन्दनम् ( रा. १२.३ ) चंदन.

**भोजन**–न., आहारः ( सुसू. ४६.४७१ ) द्र० 'आहार' जेवण.

**–विधि**–पु., आहारविधिः ( अहसू. ८.३५-३८ ) जेवणाचा विधी.

**–वारिवर्जिन्**–वि., भोजनं जलं च येन त्यक्तं त्यक्तव्यं वा सः (चचि. १२.२६) जेवण व पाणी ज्यांनी वर्ज केले वा करावयाचे ते.

**भोज्योपरोध**–पु., लक्षण० भोजनस्य गले संगः ( सुउ. ५२.७) घास लागणे, घास गळ्यात अडकणे.

**भौतिक**–वि., भूतसंबन्धि ( चशा. ८.४९ ) भूतहरम् ( चशा. ८.४९ ) पंच महाभूतासंबंधि.
मौक्तिकम् ( रा. १३.६६ ) मोती.

**–पक्तृ**–पु., पार्थिवाद्यंशपाचको भूताग्निः, स पञ्चविधः ( चचि. १५. ३८ )
पंचमहाभूतांचे पार्थिव आप्य इ० अंशांचे पचन करणारा अग्नि, पाच प्रकारचा.

**–प्रकृति**–स्त्री., महाभूतकृतस्वभावः नराणां भौतिकीं प्रकृतिं पूर्वाचार्या आहुः तत्र पवनप्रकृतेर्वातप्रकृतौ, दहनप्रकृतेः पित्तप्रकृतौ, तोयप्रकृतेः कफप्रकृतौ, अन्तर्भावो सुश्रुतेन कृतोऽस्ति। पार्थिवप्रकृतिस्तु नरः स्थिरविपुलशरीरः क्षमावांश्च । नाभसप्रकृतिस्तु नरः शुचिश्चिरजीवी महद्भिः खैर्युक्तो भवति ( सुशा. ४.८० )
पंचमहाभूतांनी निर्माण झालेली प्रकृति. पंचभूतात्मक प्रकृति. पवनप्रकृति म्हणजे वातप्रकृति. दहनप्रकृति म्हणजे पित्तप्रकृति तोयप्रकृति म्हणजे कफप्रकृति. पार्थिवप्रकृति. स्थिर व मोठे शरीर असलेला क्षमा करणारा आकाशीय प्रकृति-पवित्र रहाणारा, कान, नाक इ०ची द्वारे मोठी असणारा व दीर्घायुषी.

**भौतिकेन्द्रिय**–न., आकाशादिमहाभूतजन्यश्रोत्रादि-ज्ञानेन्द्रियमित्यायुर्वेदीयाः ( सुशा. १.१४ )
भौतिक इंद्रिये, आकाशादिकांपासून झालेली कान इत्यादि ज्ञानेंद्रिये.

**भौम**–पु., वनस्पति० पुनर्नवा ( रा. ५.४०८ ) पुनर्नवा.
सर्पभेद० त्रिविधा एते दर्वीकरमण्डलिराजिमन्द्भेदात् ( असंउ. ४ )
साप. प्रकार तीन–नाग, घोणस ( घणस ) व पट्टे असलेला सर्प.
भूमेर्विकारोऽथवाभूमेरिदमिति भूमिविकारः, पार्थिवम् ( चसू. १.६८ )
मातीपासून निर्माण झालेला, भूमीचा विकार.

**–जल**–न., भूमिप्राप्तं जलम्, तच्चाकाशगुणबहुलं ग्राह्यं, तत्तु सप्तविधं–कौपं नादेयं सारसं ताडागं प्रास्रवणमौद्भिदं चौण्ट्यं चेति ( सुसू. ४५.७ ) द्र० 'जल'
जमिनींतले वा जमिनीवरचें पाणी. ते आकाश-गुणाधिक असलेले घ्यावे. ते ७ प्रकारचे–आड, नदी, सरोवर, तलाव, झरा, तळझरा, डबके यांचे.

**–रत्न**–न., भैषज्य० प्रवालम् ( रा.१३.७३ ) प्रवाळ.

**भौर्ज**–वि., भूर्जपत्रसम्बन्धि ( चसू. ३.४ ) भूर्जपत्र.

**भ्रंश**–पु., दूरगतिः ( चसू. २०.१२ ) अलग झालेला.

**भ्रंशथु**–पु., नासागतरोग० लक्षणम्–मूर्ध्नि पूर्वसंचितः श्लेष्मा पित्तेन तप्तत्वमापन्नः सन् सदा नासाद्वारेणैव सान्द्रविदग्धो लवणगन्धवान् भूत्वाऽतिशयेनाधः स्रवति तदाऽयं रोगो ज्ञेयः ( सुउ. २२.१३-१४ )
नाकाचा एक विकार. जेव्हा साचलेला कफ पित्ताने तापून नाकातून घट्ट अर्धपक्व खारट दुर्गंधी बराच स्रवतो, तेव्हा हा भ्रंशथु रोग समजावा.

**भ्रम**–पु., रोग० अल्पसंज्ञत्वम्, अशीतिवातविकारेष्वेकः ( चसू. २०.११ ) लक्षण० ( चक. ७.४४ ) मनोविकारः ( चनि. १.२१ ) मज्जप्रदोषजरोगेष्वेकः ( चसू. २८.१७ ) चक्रस्थितस्येव संवेदनम् ( चचि. ३.३९-४० ) रजःपित्तानिलाद्भ्रमः ( सुशा. ४.५६ )
भ्रम, भोवळ, ऐशी वातविकारांपैकी एक. चक्रावर बसून फिरल्याचा भास होणे. हा एक मनाचा विकार, मज्जेचा विकार. रजोदोष व वातपित्त यांपासून होतो.

**भ्रमण**–न., चलनम् ( सुशा. ६.२४ ) चालणे.

**भ्रमर**–पु., कीट० शूकतुण्डविषः ( सुक. ३.५ ) अग्नि-प्रकृतिकः, अयं पित्तजरोगान् करोति ( सुक. ८.८-१२ )
भुंगा. सोंडेत विष असते. उष्ण प्रकृतीचा. पित्तरोग करतो.

खनिज० लोहम् ( ध. ६.२६ ) लोह.

( **भ्रमरा** )–स्त्री., वनस्पति० भृङ्गाह्वा ( रापरि. ७.२० ) माका.

( **भ्रमरी** )-स्त्री., वनस्पति० पुत्रदात्री ( रापरि. ३.४७ ) वाटोळी पाने, पांढरी फुले, दिसायला सुंदर, अतिसुगंधित, अशी पुत्र देणारी वनस्पती. हिच्या फुलांच्या माळा गळयात घालतात.

भ्रमरारिः ( रापरि. १०.४१ ) भुंगे जवळ आले तर मारणारी, माळव्यात प्रसिद्ध वेल.

वनस्पति० जन्तुकारी ( रा. ३.१२८ ) पुष्कळ पानांची, तिरक्या फळांची, खाजकुहिलीच्या फळासारखी फळे असणारी वनस्पती.

–**च्छल्ली**-स्त्री., वनस्पति० भृङ्गाह्वा (रापरि. ७.२०) माका.

–**बान्धवा**–स्त्री., वनस्पति० वासन्ती ( ध. ५.१३९ ) माधवी, कस्तुर मोगरा.

**भ्रमरातिथि**–पु., वनस्पति० चम्पकः ( रा. १०.२३८ ) सोनचाफा.

**भ्रमरानन्द**–पु., वनस्पति० बकुलः ( रा. १०.२६२ ) बकुळ.

( **भ्रमरानन्दा** )–स्त्री., अतिमुक्ता ( रा. १०.२६० ) कस्तुर मोगरा.

**भ्रमराभ**–वि., भ्रमरवन्नीलवर्णः ( सुचि. २५.३६ ) भ्रमरासारखा निळया, काळया रंगाचा.

**भ्रमरारि**–स्त्री., वनस्पति० गुणाः–तिक्ता, वातश्लेष्मज्वरशोफकण्डूतिकुष्ठव्रणदोषास्थिदोषनुत् ( रापरि. १०.४१ )

भ्रमरारि, भ्रमरच्छली, माळव्यांत प्रसिद्ध. **गुण**— कडु, वात, कफ, ज्वर, सूज, खाज, कुष्ठ, व्रणदोष, अस्थिदोष नाशक.

**भ्रमरेष्ट**–पु., वनस्पति० टिण्डुकः ( रा. ९.१४३ ) टेंटू.

( **भ्रमरेष्टा** )–स्त्री., वनस्पति० भार्ङ्गी ( रा. ६.९६ ) भारंगी.

जम्बू, वेतसी ( ध. ५.८४ ) जांभूळ.

भूमिजम्बूः ( रा. ११.१३४ ) भूजंबू, क्षुद्र जांभूळ, लहान जांभूळ.

**भ्रमरोत्सव**–पु., वनस्पति० अतिमुक्ता ( ध. ५.१५३ ) कस्तुर मोगरा.

( **भ्रमरोत्सवा** )–स्त्री., वनस्पति० माधवी ( रापरि. १०.२९ ) कस्तुर मोगरा.

**भ्रष्ट**–वि., स्थानच्युतम् ( अहसू. १७.२३ ) स्थानभ्रष्ट.

–**गुद**–न., स्वस्थानाद्बहिरागतं च तद् गुदम् ( सुचि.६.८ ) अंग बाहेर येणे, बाहेर आलेले गुद.

–**ब्रध्न**–वि., भ्रष्टगुदः ( चसू. १४.१७ ) बाहेर आलेले गुद. भ्रष्टगुद.

–**योनि**–स्त्री., रोग० स्वस्थानाच्च्युता योनिः ( चसू. १३.१६ )

स्वतःचे स्थानातून बाहेर आलेली योनि.

**भ्राजकाग्नि**–पु., भ्राजकपित्तम् 'यत्तु त्वचि पित्तं तस्मिन् भ्राजकोऽग्निरिति संज्ञा सोऽभ्यङ्गपरिषेकावगाहावलेपनादीनां क्रियाद्रव्याणां पक्ता च्छायानां च प्रकाशकः' ( सुसू. २१.१० )

भ्राजक पित्त. ते अभ्यंग, शिंपडणे, लेप इत्यादींनी त्वचेला लागलेली द्रव्ये पचविते व छाया दाखविते.

**भ्रांजन**–न., प्रकाशनं, दीपनम् ( अहसू. १२.१४ ) प्रकाशन.

**भ्राजिष्णुता**–स्त्री., दीप्तिमत्त्वम् ( सुशा. ७.१० ) दैदिप्यमान. चकचकीतपणा.

**भ्रान्तत्व**–न., भ्रमणम्, रिष्टलक्षणम् ( सुसू. ३२.४ ) भ्रमण, मरणसूचक लक्षण.

**भ्रान्तप्रेक्षिन्**–वि., सर्वपदार्थानामयथार्थं दर्शनं कुर्वाणः, सर्वपदार्थायथार्थदर्शी ( सुउ. ३९.३९ )

सर्व वस्तूंचे अयथार्थज्ञान होणे. पाहिल्यावरही योग्य ज्ञान न होणे.

**भ्रामक**–न., कान्तलोहप्रकाराऽन्यतमम् ( र. ५.८९ ) कान्तलोहाचा प्रकार.

**भ्रामर**–न., भ्रमरोद्भवं श्वेतं मधु ( चसू. २७.२४३ ) तद्गुरु पिच्छिलं स्वादु च ( सुसू. ४५.१३३-१३५ ) भुंग्यांनी जमवलेला पांढरा मध. तो जड, बुळबुळीत वगोड.

कान्तलोहप्रकारः ( ध. ६.२९ ) कान्तलोहप्रकार.

**भ्रू**–स्त्री., प्रत्यङ्ग० भ्रूदेशः, द्वे भ्रुवौ ( चशा. ७.११ ) अक्षिकूटोपरि रोमराजी ( सुसू. १२.९ ) भुवया, दोन डोळ्यांच्या खोबणीच्या वरची केसांची रांग.

–**कुटीमुख**–पु., सर्प० दर्वीकरसर्पः (सुक.४.३४(१); साप. नाग.

–**व्युदास**–पु., रोग० भ्रुवो भङ्गः, अशीतिवातविकारेष्वेकः ( चसू. २०.११ ) भुवया वटारल्या जाणे. ऐशी वातविकारांपैकी एक विकार.

**भ्रूणहन्तृ**–वि., **गर्भघातकः, भ्रूणहा** ( चसू. ८.१९ )
गर्भहत्या करणारा. गर्भघातक.

**भ्राष्ट्र**–न., **खर्पर** ( अहृसू. ६.४२ ) खापर.

**भ्वामलकी**–स्त्री., वनस्पति० **तामलकी** ( ध. ३.८४ )
भुईआवळी.

## म

**मकर**–पु., जलचरप्राणि०, **मत्स्यः, मनुष्यं कृणाति हिनस्ति, मं विषं किरति वा इति मकरः वारिशय-प्राणी**(चसू. २७.४०)**हिंस्रदंष्ट्रकः**(सुसू.४६.११८-९; अहृसू. ६.५३; असंउ. ४३.१ )
मगर, सुसर. मनुष्याला कृणाति म्हणजे मारतो किंवा म म्हणजे विष कर म्हणजे करतो फेकतो तो पाण्यातील प्राणी.

**मकरन्द**–पु., वनस्पति० **कुन्दः** ( रा. १०.२५६ )
कुंदफूल. कुन्दपुष्प.
न., **पद्मकेसरम्** ( ध. ४.१६५ )
नागकेशर, पद्मकेसर.

–**वास**–पु., वनस्पति० **धूलीकदम्बः** ( रा. ९.१७३ )
कळंब.

**मकूलक**–पु., वनस्पति० **दन्ती**(ध.१.२२३)
दन्ती, दांती.

**मकुष्टक**–पु., धान्य० **कलायभेदः** ( अहृसू. ७.३२ )
मठ. वाटाण्याचा प्रकार.

**मकुष्ठ**–पु., धान्य०**वैदलभेदःक्रमिकरोऽयम्**(सुसू.४६.२७; असंसू. ७.२६ ) मठ.

**मकुष्ठक**–पु., धान्य० **गुणाः–मधुरो ग्राही रूक्षः शीतलो रक्तपित्तज्वरादिषु शस्तः क्रमिकरः कफपित्तहरः लघुः** ( चसू. २७.२७; सुसू. ४६.३० )
हिं.—मठ.
**म.—मटकी.**
गु.—मठ.
बं.—मुगानि.
**गुण**— गोड, मळ बांधणारा, रूक्ष, थंड, हलका, रक्तपित्त ज्वर इत्यादींमध्ये प्रशस्त. कफ पित्तहर, क्रमिकर.

**( मकुष्ठका )**–स्त्री., धान्य० **गुणाः–कषाया मधुरा, लघु-र्वातला, ग्राहिणी, रुच्या, कफपित्तघ्नी, रक्तपित्त-ज्वरदाहहरा** ( ध. ६.९२ )
हिं.—माठ.
**म.—रानमूग.**
गु.—माठ.
बं.—भनमूग.
ता.—तुल्कापायरे.
रानमूग. **गुण**— तुरट, गोड, हलके, वातुळ, मळ बांधणारे, रुचकर, कफपित्तनाशक, रक्तपित्त ज्वर, दाह हारक.

**मकेरुक**–पु., **पुरीषजः क्रिमिः** ( चसू. १९.४ ( ९ ); असंनि. १४.५७ )
पुरीषामध्ये निर्माण होणाऱ्या कृमीचे नाव.

**मक्कल्ल**–पु., लक्षण० **शूलोऽयं, प्रसूताया वायुरसृगारोध्य बस्तिशिरः प्रभृतिषु शूलं करोति** (ड. सुनि. ८.६) **चतुःषष्टिसूतिकारोगेष्वेकः** ( काखिल. ११.७-१४; असंशा. ३.३५) **चिकित्सा–मक्कल्लरोगस्योपचरणम्, तच्च वीरतर्वादिसिद्धं जलम्** ( **क्वाथः** ) **ऊषकादि-कल्कमिश्रितं सर्पिषा सुखोष्णेन लवणचूर्णेन वा यथा-दोषं पाययेत्** ( सुशा.१०.२२ )
मक्कलशूल. बाळंतिणीला होणारा विकार, ६४ प्रसूति-रोगातील एक. या विकारात बाळंतिणीच्या बस्ती डोके इ० मध्ये शूल होतो.
यावर दोषाना अनुसरून वीरतर्वादिगणांचा काढा उषकादींचा कल्क, तूप घालून किंवा सैंधवचूर्ण घालून द्यावा.

–**संज्ञितविद्रधि**–पु., **मक्कल्लशूलविशेषरोगात्पश्चात् कुक्षौ विद्रधिर्जायते** ( सुवि. ९.२७ )
मक्कल्लशूलानंतर कुक्षीमध्ये एक विद्रधी होतो तो.

**मक्षिका**–स्त्री., कीट० ( चइ. २.२१ ) **सविषमक्षिका** (चचि. २३.१५८) **सा षड्विधा–तान्तारिका, कृष्णा, पिङ्गला, मधूलिका, काषायी, स्थालिकेत्येवं षट्, ताभिर्दष्टस्य कण्डूशोफदाहरुजो भवन्ति, स्थालिका-कषायीभ्यां कण्डूशोफादिसहिताः श्यावपिडको-त्पत्तिरुपद्रवाश्च ज्वरादयो भवन्ति, काषायी स्थालिका च प्राणहरे** (सुक.८.३५; सुचि.२४.८२ )
माशा. सहा प्रकारच्या माशा आहेत. कान्तारिका, कृष्णा, पिंगला, मधूलिका, कषायी, स्थालिका याप्रमाणे. त्या चावल्या असतांना खाज, सूज, दाह, ठणका उत्पन्न होतो. त्यापैकी स्थलिका आणि कषायी यांच्यापासून काळे फोड निर्माण होतात. ज्वर वगैरे उपद्रव निर्माण होतात. त्या दोन्हीही चावल्या अस-ताना प्राणही जाण्याचा धोका आहे.

**नीलमक्षिका** ( ड. सुउ. २०.१३ )
माशांची एक जात
**गृहमक्षिका** ( सुउ. ४९.३१; असंसू. ७.२६०; अहसू. ७.१४ )
घरातील माशी, गृहमक्षिका.
**वनस्पति० लक्ष्मणा** ( रापरि. ७.५५ )
लक्ष्मणा. जिच्या पानावर रक्तासारखे थेंब व जिला कंद आहे अशी वनस्पती.

**–कान्त**–न., **मक्षिकाप्रियम्** ( चचि.१९.९ )
माशीला आवडणारे.

**–क्रान्त**–न., **मक्षिकापरीतम्** ( चचि. १९.९ )
माशांनी आक्रांत, व्यापलेले.

**–दंश**–पु., **प्रायेण मक्षिका नेत्रे दशन्ति, मक्षिकादंशः श्वयथुबहुलो दाहकण्डूमांश्च भवति** ( असंउ. ४३ ) ( सुक. ८.५४-५५ )
माशीचा दंश. बहुधा माशी डोळ्याला चावते, दंशाने पुष्कळ सूज, दाह व खाज होते.

**–मल**–न., **वनस्पति० सिक्थकम्** ( रा, १३.१७३ )
मेण.

**–विष्**–स्त्री., **मक्षिकाविशेषस्य पुरीषम् छर्दिनिग्रहणार्थमुपयुक्तम्** ( चचि. २०.२९ )
माशीची लेंडी, विशेष प्रकारच्या माशीची विष्ठा ओकारी थांबण्यासाठी घेतात.

**–शकृत्**–न., **मक्षिकापुरीषम् इदं; सिताचन्दनमधुयुतं छर्दिषु शमनार्थं लेहयेत्** ( सुउ. ४९.३१ )
माशीची लेंडी. खडीसाखर, चंदन, मधयुक्त वांतीवर चाटवावी.

**मक्षिकाश्रय**–न., **प्राणिज० सिक्थम्** ( ध. ३.११९ )
मेण.

**मक्षिकोपसर्पण**–न., **मक्षिकाणामनुसरणम्, श्लेष्मजप्रमेहाणामुपद्रवः** ( सुनि. ६.१३ )
माशी अंगावर भुळभुळणे, कफज प्रमेहाचा उपद्रव.

**मख**–पु., **यज्ञः** ( असंशा. १२.८ ) यज्ञ.

**मगध**–पु., **देश० प्राचीनः प्रसिद्धो देशविशेषः स कुरुक्षेत्रात् पूर्वदेशः** ( काखिल. २५.८ )
मगध देश. कुरुक्षेत्राच्या पूर्वेकडील देश.

**( मगधा )**–स्त्री., **वनस्पति० पिप्पली** ( सुउ. ५२.३४ )
**कटुकद्रव्यस्कन्धे मगधा श्रेष्ठा** ( असंसू. १८.२८ )
पिंपळी, तिखट द्रव्यात पिंपळी ही श्रेष्ठ.

**मगधा**–स्त्री., ( सुउ. ५२.३४ ) पिंपळी.

**–फल**–न., **वनस्पति० पिप्पली** ( सुउ. ४७.३८ )
पिंपळी.

**मगधोद्भवा**–स्त्री., ( सुउ. ११.१४ )
( रा. ६.११०; र. २३.६४ ) पिंपळी.

**मङ्गल**–न., **देवतानमस्कारादिनिर्विघ्नकार्यसमाप्त्यर्थं यत् क्रियते तत्** ( चनि. ७.१६ )
मंगल, कार्य निर्विघ्न व्हावे या करिता देवतांना नमस्कार इत्यादी जे कार्य केले जाते ते.
**प्रशस्तौषधमणिधारणादि** ( सुसू. ६.२० )
प्रभावी औषधी व रत्नादिकांचे अंगावर धारण.
**अथर्ववेदे चिकित्सा** ( चसू. ३०.२१ )
अथर्ववेदात सांगितलेली चिकित्सा.
**गीतादि** ( सुसू. १६.३; अहसू. १८.१३ )
मंगलगीत इत्यादी.
**स्वस्तिकपूर्णकुम्भादि** ( ड. सुसू. १०.४ )
स्वस्तिकयुक्त कुंभ वगैरे.

**(मङ्गला)**–स्त्री., **वनस्पति० हरिद्रा** ( रा. ६.८० ) हळद.
**नीलदूर्वा** ( रा. ८.२२६ ) नीलदूर्वा.

**–च्छाय**–पु., **प्लक्षः** ( रा. ११.१२६ )
नांदरुख, पिंपरी.

**–प्रद**–पु., **भैषज्य० शङ्खः** ( रा. १३.२४४ ) शंख.

**मङ्गलाष्टशत**–न., **प्रस्थानगमनप्रवेशेषु दधिमधुघृतलाजपुष्पाऽक्षतोदुम्बराश्वत्थमुक्तामणिच्छत्रदूर्वाकुशाऽऽदर्शकन्याध्वजस्यन्दनाऽष्टापदाऽक्षनृपश्रीतरुभद्रपीठानि सस्यानि मत्स्या, हया हंसश्चाषो वृषः केसरी दक्षिणावर्तशङ्खाऽब्जसिद्धार्थका रोचना स्वस्तिकस्तोरणं कीचका वेणवो वरुणमधुमदसिक्तगण्डगजस्तोयलम्बोऽम्बुदः पूर्णकुम्भो हरिद्राऽद्रिरिन्द्रः फलान्यार्द्रमांसं सितं चामरं गौः सवत्साऽङ्गना पुत्रिणी मानुषं वर्धमानं सहस्रं नराणां प्रयुक्तानि यानानि धन्वन्तरिर्वामनो ब्राह्मणो भूमिरभ्युध्दृता सिद्धमन्नं वराहश्च तोयोत्थितस्त्रिनयनमधुसूदनस्कन्दपद्मासना लोकपालाः सुराः खं दिशोऽग्निः सरांसि स्रवन्त्यः समुद्रा मखा मारुतो ज्योतिषं धर्मशास्त्राणि तीर्थानि काव्यं धर्मार्थकामाऽऽश्रितं वालखिल्यादयो वेदवाक्यं निधिः कौस्तुभः काञ्चनं मणिभद्रः सुमेरुः प्रियङ्गुः प्रदीपो वचामोदकौ दितिरदितिररुन्धती बुद्धिः साविञ्युमाऽऽकाशगङ्गा शची देवसेना सुधा शान्तिर्लक्ष्मीःसरस्वत्यपत्यक्षमा स्वस्तिशब्दो वषट्कार ॐकारपुण्याहधर्मक्रियाश्चेतदष्टोत्तरं मङ्गलानां शतं

दर्शनात्स्पर्शनात्कीर्तनाच्चाऽशुभानि व्यपोह्याऽर्थसिद्धिं दिशन्त्युत्तमाम् ( असंशा. १२.८; असंसू. ३.२३ ) प्रवासास निघताना, बाहेर जाताना, नवीन घरात वगैरे प्रवेश करताना दही, मध, तूप, लाह्या, फुले, पूजेचे तांदुळ (अक्षता), उंबर, पिंपळ, मोती व रत्न, छत्र, दुर्वा, दर्भ, आरसा, मुलगी, निशाण, रथ, गाभण गाय वगैरे, रुद्राक्ष, राजा, बेलवृक्ष, सिंहासन, धान्य, मासे, घोडी, हंस, सुवर्ण, चातक, बैल, सिंह, उजवा शंख, कमळ, पांढऱ्या मोहऱ्या, गोरोचन, स्वस्तिक चिन्ह, तोरण, पोकळ वेळु, भरीव वेळु, वायवर्णा, ज्याच्या गण्डस्थळातून मधुर मदस्राव होत आहे असा हत्ती, पाण्यामुळे खाली लोंबलेला ढग, पाण्याने भरलेला घडा, हळद, पर्वत, इन्द्र, फळे, ओले मांस, चांदणे, चवरी, वासरासह गाय, पोराबाळांसह स्त्री, वाढत्या वयाचा मनुष्य, हजारो माणसांचा समुदाय, जोडलेली वाहने, धन्वन्तरीची मूर्ति किंवा वैद्य, वामन ( विष्णूचा पाचवा अवतार ) ब्राह्मण, वर आलेली जमीन, शिजवलेले अन्न, पाण्यातून वर आलेला डुकर, आणि हिरा, शेवाळ. शंकर, श्री कृष्ण, कार्तिकेय, ब्रह्मदेव, अष्ट दिशांचे स्वामी, देव, आकाश, दिशा, अग्नि, तळी, नद्या, समुद्र, यज्ञ, वारा, तारे, धर्मशास्त्रे, तीर्थक्षेत्रे, धर्म, अर्थ, काम ज्यात सांगितले आहेत असे काव्य, ऋषी, वेदवाक्य, खजिना, कौस्तुभमणी, सोने, यक्ष, माळेचा मेरुमणी, गहुला, दिवा, वेखंड व मोदक, दिति, अदिति, अरुन्धती, बुद्धि, सावित्री, पार्वती, आकाशगंगा, इन्द्राची बायको शची, स्कन्दाची बायको देवसेना, अमृत, शान्ती, लक्ष्मी, सरस्वती, जिला अपत्य होऊ शकेल अशी स्त्री, स्वस्ति शब्द, वषट् शब्द, ॐ शब्द, पुण्याहवाचन वगैरे धर्मकृत्य, ह्या एकशे आठ पवित्र गोष्टींच्या दर्शनाने, स्पर्शाने वा ऐकण्याने अमंगळ गोष्टीचा नाश होतो व कार्य उत्तम प्रकारे पार पडते.

**मङ्गल्य**–पु., वि., **मंगलाय हितम्** ( सुसू. ४५.६५ ) **पाण्डुवर्णः मसुरः** ( सुसू. २०.५ ) मंगलाकरिता हितकर, पांढरा मसूर.

**वनस्पति० रीठाकरञ्जः** ( रा. ९.१८६ ) रीठा.
**पिप्पलः** ( ध. ५.७८ ) पिंपळ.
**जलमधूकः** ( रा. ११.५९ ) ज्येष्ठमध.
**नारिकेलः** ( रा. ११.१०४ ) नारळ.
**कपित्थः** ( रा. ११.१५५ ) कवठ.
**जीवकः** ( रा. ५.१५४ ) जीवक, अष्टवर्गापैकी एक.
**मसूरिका** ( रा. १६.१४९ ) मसूर.
**चन्दनम्** ( रा. १२.१ ) चंदन.
**वैदलभेदः** ( ड. सुसू. ४६.२७ ) मसूर.
**खनिज० सुवर्णम्** ( रा. १३.३ ) सोने.
**भेषजद्रव्य० सिन्दूरम्** ( रा. १२.१६१ ) शेंदूर.

( **मङ्गल्या** )–स्त्री., **वनस्पति० ऋद्धिः** ( रा. ५.१८८ ) ऋद्धि, अष्टवर्गापैकी एक.
**वनस्पति० माषपर्णी** ( रा. ३.१७० ) रानउडीद.
**जीवन्ती** ( रा. ३.१७७ ) हरिणदोडी.
**प्रियङ्गुः** ( रा. १२.२९ ) गव्हला.
**हरिद्रा** ( रा. ६.८० ) हळद.
**शमी** ( ध. ५.९५ ) शमी.
**वचा** ( रा. ६.८ ) वेखंड.
**गोरोचना** ( रा. १२.३३ ) गोरोचन.
**श्वेतवचा** ( रा. ६.१० ) पांढरे वेखंड, अतिविष.
**अगरुभेदः** ( रा. १२.४५ ) अगरुप्रकार.

**मङ्गल्यकघृत**-न., **घृत० विषमज्वरनाशनं सिद्धघृतम्** ( काखिल. ११.१६७-६८ ) सिद्धघृत. विषमज्वरनाशक.

**मज्जन्**–पु., **अस्थिविवरगतोऽतिस्निग्धधातुः** ( अहसू. १.१३; चचि. १५.१६; सुसू. १४.१० ) **मज्जवहस्रोतांसि मज्ज्ञः स्थानं, मज्जवहस्रोतसाम-स्थीनि मूलं संधयश्च** ( चवि. ५.८ ) **अस्थ्नो मज्जा जायते** ( चचि. १५.१६ ) **मेदसोऽस्थिषु पूरणात् मज्जा जायते इत्यप्युक्तम्** ( चचि. १५.३२ ) **पञ्चविंशतितमे दिने मज्जा प्रजायते** (सुसू. १४.१०) **अस्थ्नो मज्जोद्भवे पञ्चदिनान्यावश्यकानि** ( सुसू. १४.१० ) **अतिस्निग्धो गुरुश्चेति मज्ज्ञः स्वरूपम्। मज्जसारलक्षणम् – अकृशोत्तमबलः स्निग्धगम्भीरस्वरः सौभाग्योपपन्नो महानेत्रश्च** ( सुसू. ३५.१६ ) **मज्ज्ञमानमेकोऽञ्जलिः** ( अहशा. ३०.८० ) **अस्थिपूरणं मज्ज्ञः श्रेष्ठ कर्म** ( अहसू. ११.४ ) **मज्जास्नेहं बलं शुक्रपुष्टिमस्थ्नां पूरणं च करोति** ( सुसू. १५–५–१ ) **केशाः मज्ज्ञः उपधातुः** (शार्ङ्गधरः) **अक्षित्वग्विशां स्नेहो मज्जमलः** ( अहशा. ३.६४ ) **मज्जा वृद्धो नेत्रयोरङ्गानां च गौरवं कुर्यात्** ( अहसू. ११.११ ) **मज्जनि क्षीणेऽस्थ्नां सौषिर्यं भ्रमादिश्च** ( अहसू. ११.१९ ) **तमो-**

**दर्शनमूर्च्छाभ्रमपर्वस्थूलमूलारुर्जन्मनेत्राभिष्यन्द-प्रभृतयो मज्जदोषजाः विकाराः** ( सुसू. २४.९ ) **मांसमज्जाऽस्थिस्नेहसंयुतं स्वाद्वम्लसंयुतं द्रव्यं मज्ज-क्षीणोऽभिकाङ्क्षति** (ड. सुसू. १५.२९-३१) **स्थूलास्थिषु विशेषेण अभ्यन्तराश्रितो मज्जा** (सुशा. ४.१३) **यस्य फलस्य मज्जाऽस्ति तस्य फलस्य वीर्यमिव मज्ज्ञो वीर्यम्** ( सुसू. ४६.२०८ ) **अस्थि-गतधातुविशेषः, गुणाः—मधुरो बृंहणो वृष्यो बल्यश्च। तस्य शैत्योष्णे यथासत्वं बोद्धव्ये** (चसू. २७.२९५) हाडांच्या पोकळीत असणारा अतिस्निग्ध धातुरूप पदार्थ. अस्थि आणि संधि मज्जावह स्रोतसाचे मूळ आहे. ही स्रोतसे मज्जेचे स्थान आहेत. अस्थीपासून मज्जा होते. अस्थीमध्ये मेद भरला जाऊन मज्जा होते, अतिस्निग्ध, गुरु, असे मज्जेचे स्वरूप आहे. आहार सेवनानंतर २५ व्या दिवशी मज्जा तयार होते. अस्थीपासून मज्जा होण्याला पाच दिवस लागतात. मज्जासार लक्षणे—फार लठ्ठ नाही, फार कृश नाही, असा मध्यम आकार, उत्तम बल, स्निग्ध, गंभीर स्वर, भाग्यशाली, मोठे डोळे, स्थूल दीर्घ वाटोळे सांधे असणारे लोक मज्जासार समजावे. मज्जेचे शरिरातील प्रमाण १ अंजलि आहे. अस्थिपूरण करणे हे मज्जेचे श्रेष्ठकर्म आहे. डोळे त्वचा आणि विष्ठा यांचा स्नेह हा मज्जेचा मल आहे. मज्जा ही स्नेह बल, शुक्रपुष्टि, अस्थिपूरण करते. मज्जेचा केश हा उपधातु आहे. मज्जा क्षीण झाली तर हाडे पोकळ होतात, चक्कर येते. डोळ्यापुढे अंधारी येते, भ्रम होतो. मज्जेची वृद्धि झाल्यास डोके आणि अवयव जड होतात. पेऱ्यांच्या आणि वरील ठिकाणी खोल मुळे गेलेले फोड ( खवड्यासारखे ) होतात. मज्जादुष्टीने डोळे येणे वगैरे विकार होतात. मांस, मज्जा अस्थिस्नेहयुक्त व गोड आंबट द्रव्यांची इच्छा होते.

मोठ्या हाडामध्ये मज्जा विशेष स्वरूपात असते. फळाच्या वीर्याप्रमाणे त्यातील मज्जेचेच वीर्य असते. मज्जा— मधुर, बृंहण, वृष्य, आणि बलवर्धक आहे. प्राण्यांच्या मांसाच्या गुणधर्माप्रमाणे त्यांच्या मज्जेचे वीर्य असते.

**( मज्ज )-परिपाक**—पु., **लक्षण० अस्थिमध्यस्थः मज्जापाकः** ( सुनि. ९.३४ )
अस्थीमधील मज्जेचा पाक.

**—मेह**—पु., **रोग० वातजोऽयम्, मज्जमिश्रं मज्जानं वा मेहति** ( असंनि. १०.२७; चनि. ४.३९ ) मज्जामेह. वातजमेह. मज्जा किंवा मज्जामिश्र लघ्वी यात होते.



**—वाहिस्रोतस्**—न., **स्रोतो० उत्पेषात्यभिष्यन्दाभि-घातप्रपीडनैर्विरुद्धानां सेवनेन दुष्यति** ( चवि. ५.१८; असंशा. ६.४३ ) मज्जावाहिस्रोतस. विरुद्ध सेवन, आघात, जोराने दाबणे, अतिस्रावी द्रव्यांचे सेवन यांनी ही स्रोतसे दुष्ट होतात.

**—सार**—पु., **मृद्वङ्गाः बलवन्तः स्निग्धवर्णस्वराः स्थूलदीर्घवृत्तसंधयश्च मज्जसाराः ते दीर्घायुषो बलवन्तःश्रुतवित्तविज्ञानाऽपत्यसंमानभाजश्च भवन्ति** ( चवि. ८.१०८; सुसू. ३५.१६ ) द्र० **'मज्जन्'** मज्जासार. याचे अंग मृदु, बलवान; स्निग्ध वर्ण स्वर; स्थूल लांब वाटोळे संधि असतात. ते दीर्घायुषी बलवान, ज्ञान विज्ञान संपत्ति संतति सन्मान युक्त असतात.

**मज्जर**—पु., **वनस्पति० तद्गुणाः— मधुरो धेनुदुग्धकरः** ( रापरि. ८.५२ )
एक प्रकारचे गवत आहे. गोड व गाईंना अधिक दूध उत्पन्न करते.

**मज्जा**—स्त्री., **अस्थ्नः शुद्धस्नेहभागः** ( चशा. ७.१५ )
अस्थीचा शुद्ध स्नेहभाग, मज्जाधातु.
**चतुर्षु स्नेहेष्वेकः** ( चसू. १.८६ )
चार स्नेहांपैकी एक.
**फलमज्जा** ( चक. ८.७ ) फळाच्या बीमधील गर.

**—ज**—पु., **वनस्पति० भूमिजः** ( रा. १२.१८९ )
एक प्रकारचा गुग्गुळ.

**—सार**—न., **वनस्पति० जातीफलम्** ( रा. १२.६७ )
जायफळ.

**मञ्जिपत्र**—न., **वनस्पति० सुरपर्णकम्** ( रापरि. १०.५० )
सूक्ष्म सुवासिक पानांची वनस्पती.

**मञ्जरि**—स्त्री., **पुष्पशाखा** ( असंसू. १६.१८ ) मंजिरी.

**मञ्जरी**—स्त्री., **वनस्पति० सुरसा** ( रा. १०.७८ ) तुळस.

**—नम्र**—पु., **वनस्पति० वेतसः** ( ध. ५.११६ )
जलवेतस.

**मञ्जारी**—स्त्री., **साधपादद्वयम्** (र. २२.१२३) अडीच.

**मञ्जिष्ठ**—न., **रक्तवर्णं मूलम्** ( र. १०.९१ ) मंजिष्ठा.

**( मञ्जिष्ठा )**—स्त्री., **वनस्पति० मञ्जिष्ठा मधुरा तिक्ता कषाया स्वरवर्णकृत्। गुरुरुष्णा विषश्लेष्मशोथ-योन्यक्षिकर्णरुक्। रक्तातीसारकुष्ठास्रवीसर्प-व्रणमेहनुत्** ( भा. प्र. )

हिं.—मञ्जीठ.
**म.—मंजिष्ठ.**
गु.—मजीठ.
बं.—मंजिष्ठा.
ता.—मञ्जिहि.

मंजिष्ठा—मधुर, कडु, तुरट, स्वरवर्ण चांगले करणारे आहे. पचनास जड, उष्ण, विष-कफ-सूज-योनिरोग-कर्णरोग-रक्तातीसार-कुष्ठ-रक्तवीसर्प-व्रण-मेह नाशक आहे.

**रक्तवर्णा वनस्पतिः** ( र. ३.६६ )
मंजिष्ठा ही तांबड्या रंगाची वनस्पती आहे.

**महाकषायवर्गे वर्ण्यादिगणेषु एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१० ) महाकषायवर्गातील एक.

**लता, पित्तसंशमनवर्गे प्रोक्ता** ( सुसू. ३९.८ )
वेल. ही पित्तशामकवर्गात सांगितली आहे.

**मूषिकविषहरा तज्जनितकर्णिकापातनी च** ( असंउ. ४६; असंसू. १५.३८ )
मंजिष्ठा उंदीरविषनाशक व त्या विषाने उत्पन्न होणाऱ्या गांधी नष्ट करणारे आहे.

**—मेह**—पु., **पित्तनिमित्तः प्रमेहभेदः** (चसू. १९.४; (९) ( सुचि. ११.९ )

**लक्षणानि—अस्मिन् मञ्जिष्ठोदकसंकाशं भृशं विस्रं च पित्तस्य परिकोपात् प्रमेहति** ( चनि. ४.३३ )
मंजिष्ठमेह. पित्तज मेहाचा प्रकार. यांत मंजिष्ठाच्या काढ्यासारखी पुष्कळ दुर्गंधि लघ्वी होते. पित्ताच्या प्रकोपाने हा होतो.

**मञ्जिष्ठादिकषाय**—पु., **मञ्जिष्ठामुस्तकदेवदारुखदिरश्रेष्ठावचाबाकुचीपाठापर्पटाऽऽरग्वधकटुकीमधुयष्टीमूर्वाहरिद्रात्रायमाणाकिटिमारविडङ्गवासाऽमृतागुडूचीवत्सककाकोलीधन्वयासा इति मञ्जिष्ठाऽऽदिकषायगणः अयं कुष्ठघ्नः** ( र. २०.३१-३२ )
मंजिष्ठादि काढा. यांतील औषधे. मंजिष्ठा, नागरमोथे, देवदार, खैर, त्रिफळा, वेखंड, बावची, पाहाडमूळ, पित्तपापडा, बाहवा, कुटकी, जेष्ठमध, मोरवेल, हळद, निशोत्तर, किडामारी, वावडिंग, अडुळसा, गुळवेल, कुडा, काकोली, धमासा.

**मञ्जिष्ठादिसर्पिस्**—न., **घृतं० इदं योनिशूलं शुक्रदोषं च नाशयेत्** ( र. २५.८२-८४ )
मंजिष्ठादिघृत हे योनिशूल व शुक्रदोष-नाशक,

**मञ्जिष्ठोदक**—पु., **लोहितवर्णसदृशः मञ्जिष्ठक्वाथः** ( सुनि. ६.११ )
रक्ताच्या रंगासारखा मंजिष्ठेचा काढा.

**मञ्जुका**—स्त्री., **वनस्पति० मञ्जिष्ठा** (ध. १.१७) मंजिष्ठा.

**मञ्जूलीयक**—पु., **प्रतुदपक्षिः** (असंसू. ७.७२-७५)
प्रतुदपक्ष्यांपैकी एक.

**मञ्जूषमूषा**—स्त्री., **एषा मण्डूकमूषायाः अपरा सञ्ज्ञा** ( र. १०.३१ ) मंडूकमूषा. हिलाच मंजूषमूषा नाव आहे.

**मञ्जूषा**—स्त्री., **वनस्पति० मञ्जिष्ठा** ( रा. ६.१६ )
मंजिष्ठा.

**मणि**—पु., **रत्न० यस्य धारणेन भूतादीनामुपशमो भवति** ( चनि. ७.१७; सुसू. ४५.१७ ) **मरकतचन्द्रकान्तपद्मरागादि** (अ. चवि. ६.१८ )
मरकत, चंद्रकान्त, पद्मराग इ० रत्ने, यांचे धारणाने भूत पिशाश्च यांचा नाश होतो.

**सर्पफणोद्भतो मणिः** (इन्दुः; असंउ. ४२; अहृसू. १३.५)
सर्पाच्या फणेवरील मणी.

**अवयव० लिङ्गस्याऽग्रभागः** ( चचि. ३०.१७५; सुउ. ५८.१५ )
शिश्नाच्या पुढचा भाग. मणी.

**—कुट्टिम**—न., **मणियुक्ता भूः** ( अहृसू. ३.२४ )
मणी किंवा काचेचे तुकडे जुळवून बसवून आवरण केलेली जागा.

**—चूर्ण**—न., **स्फाटिकादिचूर्णम्, व्रणस्य सवर्णप्रयोगे उपयुक्तम्** ( सुचि. १.१०० )
स्फटिकचूर्ण, व्रणाचा रंग स्वाभाविक करण्यासाठी उपयुक्त.

**—च्छिद्रा**—स्त्री., **वनस्पति० मेदा** ( ध. १.१२७ )
मेदा, अष्टवर्गापैकी.

**—तुण्डिक**—पु., **जलचरप्राणिविशेषः** (असंसू. ७.८१-८३) एक जलचर प्राणी.

**—पर्पटी**—स्त्री., **भैषज्य० नासिकारोगविनाशकरी** ( र. २४.२६-३० )
सिद्धौषधीचे नाव. नाकासंबंधी रोगांचा नाश करणारे औषध.

**—बन्ध**—पु., **शारीर० संधिः** ( सुचि. ३.३३ ) मनगट.
**मर्मविशेषः** ( असंशा. ७.६ ) **अस्मिन् विद्धे कुण्ठता** ( सुशा. ६.२४ )
मर्माचे नाव. यावर आघात झाला तर अंगविकलता येते,

पाणिमूलम् ( सुचि. ५.४ ) हाताचे मूळ, काख.

**-बन्धकर्पूरान्तर**-न., प्रमाणम्, षोडशाङ्गुलम्, दीर्घायुःपुरुषलक्षणम् ( सुसू. ३५.१२ )

मनगट आणि कोपर यामधील अंतर जर १६ अंगुळे असेल तर ती व्यक्ति दीर्घायु आहे असे समजावे.

**-बीज**-पु., फल० दाडिमः ( रा. ११.९४ ) डाळिंब.

**-भद्र**-पु., देवयोनि० यज्ञः ( असंशा. १२.८ ) यक्ष.

**-भाजन**-न., रत्नखचितं पात्रम्, शिशिरवारिपूर्णं गुल्मदेशोपरि धारणार्थम्

( असंचि. १६; सुउ. ४२.१०५ )

रत्नजडित भांडे थंड पाण्याने भरून गुल्माचे भागावर ठेवावे.

**-मन्थ**-न., भैषज्य० सैन्धवम् (ध. २.२५;असंउ.८) सैंधव.

**-मयपात्र**-न., (परिव०) रत्नखचितं पात्रम् ( सुसू. ४५.१३ ) रत्नजडित भांडे.

**-रत्न**-न., पद्मरागमहानीलपुष्परागविदूरकुमुक्ता-विद्रुमवज्रेन्द्रवैडूर्यस्फटिकादि ( असंसू. १२.२१ ) रत्ने.पद्मराग, महानील, पुष्पराज, विदूरक, मोती, पोवळे, हिरा, वैडूर्य, स्फटिक वगैरे.

**-राग**-न., खनिज० हिङ्गुलम् (रा. १३.४८) हिंगूळ.

**-रागकर**-न., खनिज० हिङ्गुलम् (ध. ६.४०) हिंगूळ.

**-शिला**-स्त्री., खनिज० मनःशिला ( र. १२.९९ ) मनशीळ.

**मणिक**-पु., गोलकः भाण्डविशेषो वर्तुलाकारः ( चसू. १५.७ ) गोल आकाराचे भांडे.

भुजास्थि ( चशा. ७.६ ) बाहूतील हाड.

करबाहुसन्धिः ( चइ. ३.५ ) हात आणि बाहुसंधि.

**मण्ड**-पु., आहारद्रव्य० सिक्थैर्विरहितो मण्डः ( सुसू. ४६.३४४ ) मस्तुकः ( सुसू. ४५.९० ) अग्निदीपनो वातानुलोमनः स्वेदजननः स्रोतोमृदुत्वकारी लङ्घितविरिक्ततृषितानां प्राणधारणश्च ( चसू. २७.२५३ ) स चतुर्विधः, तद्यथा-मण्डः पेया विलेपी यवागूश्च ( सुसू. ४६.३४४;

अहसू. ६.२६-२७; असंसू. ७.४०-४१ )

भात शिजविल्यावर त्यावरील घट्ट शिते नसलेल्या पातळ द्रवाला मंड, निवळ म्हणतात. मंड अग्निदीपन, वातानुलोमन, घाम आणणारा, स्रोतसे मऊ करणारा, लंघन, विरेचन, आणि तहान यांनी पीडितांना प्राणाधार आहे.

दधिमण्डः ( चसू. २७.२२८ ) दह्याची निवळ.

**( मण्डा )**-स्त्री., सुरा ( ध. ६.२५५ ) सुरा, दारूचा प्रकार.

**मण्डक**-पु., व्रीहि० ( रा. १६.९७ ) तांदळाचा प्रकार.

आहारद्रव्य० गोधूमपिष्टकृतं पक्वान्नम् ( र. २७.९४-९६ ) मांडे, कणकेचे पक्वान्न.

**मण्डन**-पु., अतिमुक्तः ( ध. ५.१५३ ) निर्मुक्त.

**मण्डपारोह**-पु., वनस्पति० मुखालुः (रा. परि. ७.२२) मुखाळू नावाचा गोड कंद.

**मण्डपी**-स्त्री., वनस्पति० निष्पावी ( रा परि. ७.९९ ) आबई.

क्षुद्रोपोदकी ( रापरि. ७.७६ ) बारीक घोळ.

**मण्डल**-पु., वेष्टनाकारव्रणबन्धः बाहुपार्श्वोदरोरुपृष्ठादिके वृत्तेऽङ्गे मण्डलबन्धो विधेयः ( सुसू. १८.१७-१८;

असंसू. ३८.४२; अहसू. २९.६० )

बाहु, पार्श्व, उदर, मांडी, पाठ वगैरे वाटोळ्या भागांवर गोलाकार बांधावा लागणारा बंध.

न., वर्तुलं, चक्राकृतिः ( चसू. १९.४ )

वर्तुळ, वर्तुळाकार व्रणबंध.

रोग० सप्तकुष्ठेष्वेकम् ( चसू.१९.४ ( २ ) कफाधिक्यात् मण्डलाकारं कुष्ठं भवति । तत्र श्वेतं रक्तं स्थिरं स्त्यानं स्निग्धमुत्सन्नमण्डलमन्योन्यसंसक्तं चेति मण्डलस्वरूपं तच्च कृच्छ्रसाध्यम्

(चचि. ७.१६; चसू. १९.४ ( २ )

लेख्यरोगोऽयम् ( सुसू. २५.९-१० )

मंडळ नावाचे सात कुष्ठांपैकी एक कुष्ठ. कफाचे आधिक्याने होणारे. ते पांढरके, तांबूस, एका जागी स्थिर, घट्ट, स्निग्ध, कातडीपासून उंचसर वर्तुळाकार चट्टे, एकमेकात मिसळून असणारे कुष्ठ आहे. हे कृच्छ्रसाध्य. लेखन करून रक्तस्राव करण्यासारखा हा विकार आहे.

शारीर० वर्तुलाकारो नेत्रभागः, पक्ष्मवर्त्मश्वेतकृष्णदृष्टीनां पञ्च मण्डलानि नेत्रे बाह्यतो मध्यपर्यन्तं क्रमेण भवन्ति ( सुउ. १.१५ )

डोळ्याची गोलाकार पाच अंगे. पापणीचे केस, पापण्या, पांढरा बुबुळ, काळा बुबुळ, आणि दृष्टि ( बाहुली, पुतळी ) ही पाच मंडले नेत्रामध्ये बाह्य भागापासून मध्यभागापर्यंत क्रमाने असतात.

संधि० मण्डलाकृतिसंधिः ( सुशा. ५.२७ ) कण्ठनेत्रहृदयक्लोमनाडीषु मण्डलसंज्ञाः

( असंशा. ५.७७ )

गोल आकृतीचे सांधे, गळा, नेत्र, हृदय, क्लोम यांच्या नाडीमध्ये गोल सांधे असतात.

**काल०** **द्वाचत्वारिंशदष्टचत्वारिंशद्वा दिनानि** ( र. १४.५२ )

काल, ४२ दिवसांचा किंवा ४८ दिवसांचा काल.

**( मण्डला )**–स्त्री., **रोग०** **क्षुद्ररोगः विपुलोत्सन्ना सरागा पिटिकाऽऽचिता पिटिका** ( असंउ. ३६ )

क्षुद्ररोगांपैकी एक; पुळी. पुष्कळ फुगलेली लालसर पुळ्यांनी युक्त पुळी.

**( मण्डली )**–स्त्री., **वनस्पति०** **स्वादुपत्रफला** (रा. ७.७६ ) गोडे पडवळ.

**वनस्पति०** **गुडूची** (ध. १.३) **वटः** (रा. ११.११३) गुळवेल, वड.

**–पत्रिका**–स्त्री., **वनस्पति०** **क्रूरः** ( रा. ५.४०६ ) तांबडा पुनर्नवा.

**–पर्णिका**–स्त्री., **वनस्पति०** **शिंशपा** (इन्दु. असंउ. ४४) शिसव.

**–पुच्छक**–पु., **कीट०** **प्राणनाशनः** ( असंउ. ४३ ) **तेन दष्टस्य वेगज्ञानं सर्पवद्भवति तास्ताश्च तीव्रा वेदना भवन्ति । तथा सांनिपातिका रोगा भवन्ति, दंशस्तु वर्णेन रक्तपीताऽसितारुणः क्षाराग्निदग्धवच्च** ( सुक. ८.१६-१८ )

मंडलपुच्छक नावाचा विषारी प्राणी. तो चावला असताना तीव्र वेदना. साप चावल्याप्रमाणे होतात. त्रैदोषिक विकार उत्पन्न होतात. चावलेली जागा लाल, पिंवळी, काळी, निळी होते. क्षार किंवा अग्नीने भाजल्या सारखी दिसते.

**मण्डलाग्र**–न., **शस्त्र.** **अतन्मुखसंज्ञितमग्रेऽर्धचन्द्राकारं शस्त्रम्,** ( सुचि. १५.१२ ) **वर्त्मरोगे छेदनार्थमुपयुज्यते** ( असंउ. १२; अहसू. २६.५; असंसू. ३४. २४ )

मंडलाग्र नावाचे शस्त्र. या शस्त्राला अन्तर्मुख असेही नाव आहे. टोकाला अर्धचंद्राप्रमाणे असणारे शस्त्र; वर्त्मरोगामध्ये छेदनाकरिता उपयोगी.

**मण्डलिन्**–वि., **सर्प०** **अस्य विषं पित्तप्रकोपणमित्याहुः** ( चचि. २३. १२४ ) **मण्डलयुक्तः सर्पः** ( चचि.२३. १२५ ) **मण्डलिनः द्वाविंशतिर्ज्ञेयाः –आदर्शमण्डलः, श्वेतमण्डलो, रक्तमण्डल· श्वित्रमण्डलः, पृषतो, रोध्रपुष्पो, मिलिन्दको, गोनसो, वृद्धगोनसः, पनसो, महापनसो, वेणुपत्रकः, शिशुकोमदनः, पलिन्दरः, पिङ्गलः, पुष्प० पाण्डुः, षडङ्गोऽग्निको बभ्रुः, कषायः, कलुषः पारावतो, हस्तभरणश्चित्रक एणीपदः** ( सुक. ४. ३४ )

मंडलि नावाचा साप. याच्या २२ जाती आहेत. याचे विष पित्तप्रकोपक आहे. मंडले असणारा साप. ह्या मंडलि सापाचे बावीस प्रकार आहेत. ( १ ) आदर्श मंडल ( २ ) श्वेतमंडल ( ३ ) रक्तमंडल ( ४ ) श्वित्रमंडल ( ५ ) पृषत ( ६ ) रोध्रपुष्प ( ६ ) मिलिन्दक ( ७ ) गोनस ( ८ ) वृद्धगोनस ( ९ ) पनस ( १० ) महापनस ( ११ ) वेणुपत्रक ( १२ ) शिशुकोमदन ( १३ ) पालिन्दर ( १४ ) पिंगल ( १५ ) पुष्पपाण्डु ( १६ ) षडंग ( १७ ) अग्निक ( १८ ) बभ्रुः ( १९ ) कषाय ( २० ) कलुष ( २१ ) पारावत, हस्तभरण चित्रक ( २२ ) एणीपद.

**( मण्डलि )–दंश**–पु; **मण्डलिसर्पस्य दंशः** (सुक. ५.७ ) मंडलीसर्पाचा दंश.

**–विष**–न., **तल्लक्षणम्–त्वगादीनां पीतत्वं शीताभिलाषा परिधूपनं दाहस्तृष्णा मदो मूर्च्छा ज्वरः शोणितागमनमूर्ध्वमधश्च मासानामवशातनं श्वयथुर्दंशकोथः पीतरूपदर्शनमाशुकोपस्तास्तांश्च पित्तवेदना भवन्ति** ( सुक. ४.३७ )

मंडलीसर्पाच्या विषामुळे त्वचा पिवळी होते, थंडी वाजू लागते, दाह, तहान, मेद, मूर्च्छा, ज्वर, रक्तस्राव, मांस गळू लागते, सूज—प्राधान्याने पित्तकोपाची सर्व चिन्हे.

**मण्डितुण्डिका**–स्त्री., **पक्षि०** **सुश्रुते प्लववर्गे डल्हणेन निर्दिष्टः पक्षि०** ( सुसू. ४६.१०५ )

पाण्यात पोहणाऱ्या पक्षिवर्गातील एक पक्षी.

**मण्डूक**–पु., **जलचरप्राणि०** **अस्य दंशाद्विषबाधा भवति । मण्डूकैः सविषैर्दष्टलक्षणम् छर्दिर्निद्रा च** ( चचि. २३.१५४; ध. ६.४८३ ) **भेकः, स चाष्टविधः—कृष्णः, सारः, कुहको हरितो रक्तो, यववर्णाभो भृकुटी, कोटिकश्च** ( सुक. ८.३१; माविषरोग. ५१; र. ५.२१ )

बेडूक. जलचर प्राणी आहे. हा चावला तर विषबाधा होते. **सविष बेडूक चावल्याची लक्षणे**— ओकारी होणे वा निद्रा येणे. बेडूक आठ प्रकारचे आहेत. (१) कृष्ण (२) सार (३) कुहक (४) हरित

(५) रक्त (६) यववर्णाप्रमाणे (७)भृकुटि व (८)कोटिक न., चतुर्विधाभ्रकाणामन्यतमम् ( र. २.५ ) चार प्रकारच्या अभ्रकांपैकी एक.

**( मण्डूकी )**–स्त्री., वनस्पति० ब्राह्मी ( र. २२.४४-४८; सुउ. २१.४५; रा. ५.१४८ ) ब्राह्मी.

**आदित्यभक्ता** ( ध. ४.९८ ) सूर्यवेल.

**मण्डूकपर्णी** ( र. २७.९७-१०१ ) मंडूकपर्णी, उंदीरकानी.

**भैषज्य० मुक्तानां शुक्तिः नेत्ररोगे लेखनार्थमुपयुक्ता** ( सुउ. १५.२५-२८ ) मोत्याचा शिंपला, डोळ्याच्या रोगाचे दोष खरडून काढण्यास उपयुक्त.

**–पर्ण**–पु., वनस्पति० पृथुशिम्बः ( रा. ९.१४२ ) दिंडा.

**(–पर्णी )**–स्त्री., वनस्पति० ब्राह्मी,गुणाः–कषाया पित्ते हिता स्वादुपाकरसा हिमा, लघ्वी च ( सुसू. ४६.२६२ ) क्षतक्षीणे उपयोज्या ( चचि. ११.९२ )

हिं.—ब्रह्ममाण्डूकी.

**म.—ब्राह्मी.**

गु.—कडब्राह्मि.

बं—थुलकुडि.

त.—वल्लारै.

**शाक०** ( चसू. २७.९५; र. ११.५२-५७ ) ब्राह्मी. **गुण**—कषायरस, पित्तशामक, मधुरविपाकी, थंड, लघु, उरःक्षताने क्षीण झालेल्या ठिकाणी व्रण रोपक म्हणून योजावा. भाजी म्हणूनहि उपयोग करावा.

**आदित्यभक्ता** ( ध. ४.९८ ) सूर्यवेल.

**मञ्जिष्ठा** (रा. ६.१६ अहसू. ६.७६; असंसू. १५.४९) मंजिष्ठा.

**वयःस्थापनगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१८ ) वय ढळू नये, म्हातारपण येऊ नये म्हणून उपयोगात आणावयाच्या द्रव्यांतील एक.

**–पर्ण्यादिगण**–पु., शाकगण० ( चसू. २७.९५-९७ ) द्र० 'वर्ग' मंडूकपर्ण्यादिगण भाजीचा वर्ग.

**–पर्ण्यादिवर्ग**–पु., द्रव्यगण० **तिक्तरसप्रायाणि शाकानि, मण्डूकपर्णीसप्तलासुनिषण्णकसुवर्चला-पिप्पलीगुडूचीगोजिह्वाकाकमाचीप्रपुन्नाडाऽवल्गुज-सतीनबृहतीकण्टकारिकाफलपटोलवार्ताककारवेल्लक-कटुकिकाकेबुकोरुबूकपर्पटककिराततिक्तकर्कोटकारि-ष्टकोशातकीवेत्रकरीराऽऽटरूषकाऽर्कपुष्पीप्रभृतीनि। रक्तपित्तहरण्याहुर्हृद्यानि सुलघूनि च, कुष्ठमेहज्वर-श्वासकासाऽरुचिहराणि च** ( सुसू. ४६.२६२-६३ ) मंडूकपर्ण्यादिवर्ग– कडू रसाच्या भाज्या– उंदीरकानी, शिकेकाई, कुरडू, सुवर्चल, पिंपळी, गुळवेल, गोजिव्हा, काकमाची, टाकळा, वावर्ची, गोल वाटाणा, मोठी रिंगणी, डोरली, गेळफळ, कडु पडवळ, वांगे, कारले, रानकासविंदा ( तिक्तारिका ), एरंड, पित्तपापडा, काडेकिराईत, ऊस, निंब, घोसाळे, वेताचे कोंब, अडुळसा, रुईच्या पानासारख्या पानांची वनस्पती वगैरे रक्तपित्तनाशक, हृदयाला हितकर, पचावयास फार हलका, कुष्ठ, मेह, ज्वर, श्वास, कास, अरुचि नाशक.

**–मातृ**–स्त्री., वनस्पति० ब्राह्मी ( रा. ५.१४८ ) ब्राह्मी.

**–मूषा**–स्त्री., मूषाविशेषः ( र. १०.३१ ) मूषेचे नाव, एक मूस.

**मण्डूकोत्पत्ति**–स्त्री., मण्डूकानामुत्पत्तिः, तद्यथा–**प्रावृट्काले वर्षमाणे महोरगः शुक्रं सृजेत्, ततः शरत्प्रतप्तायां भूमौ जलस्य मण्डो भवति, तस्मिन् मण्डोदके जाता मण्डूकाः, तेन संज्ञिता मण्डूका इति** ( ड. सुक. ८.३१ ) बेडकांची उत्पत्ति. पावसाळ्यात पाऊस पडत असतांना सर्पाच्या जातीचा एक प्राणी शुक्रस्राव करतो. ते शुक्र शरद ऋतूतील तापलेल्या भूमीत चिखल खाली बसून वर येणाऱ्या मळकट पाण्यात झालेला बेडूक.

**मण्डूर**–न., लोहकिट्टम् ( चचि. १६.७२ ) गुणाः– **मधुर-कटूष्णं, कृमिवातनुत्, पक्तिशूलमरुच्छूलमेहगुल्मार्ति शोफनुत्** ( ध. ६.३५ ) तस्य **निर्माणविधिः– प्रथमतो गोमूत्रेण त्रिफला क्वथनीया। ततस्तत्क्वाथे सम्यक्परितप्तं लोहकिट्टं शनैस्तावत्सेचयेत्, यावत् स्वयं जीर्णतामाप्नोति । पश्चात्तच्चूर्णं पेषणयोग्यं जायते । एतत् त्रिफलाक्वाथसिञ्चितं लोहकिट्टं मण्डूर-नाम्ना समाख्यातम्** ( र. ५.१५९ ) **इदं पाण्डु-रोगशमनम्** ( सुउ. ४४.२३ )

मंडूर. **मंडूराचे गुण**—मधुर, तिखट, उष्ण, कृमि आणि वातनाशक, अन्न पचताना होणारा शूल, वातजशूल, मेह, गुल्म, सूज नाहीसे करणारे आहे.

**निर्माण करण्याची रीति**—प्रथम गोमूत्रात

त्रिफळ्याचा काढा करावा. नंतर त्या काढ्यामध्ये चांगले तापलेले लोहाचे किट्ट टाकावे. बऱ्याच वेळा याप्रमाणे केले की ते घोटण्याइतके सूक्ष्म होते. ते मंडूर होय. हे पांडुरोग नाशक आहे.

**–वटक**–पु., योग० **पाण्डुरोगे उपयुक्तः, गुडनागरमण्डूरतिलांशान्मानत; समान् गृहीत्वा पिप्पलीं द्विगुणां गृहीत्वा च गुटिकाः च कृत्वा पाण्डुरोगिणे दद्यात् । त्रिफलात्रिकटुमुस्तविडङ्गचवकचित्रकदार्वीत्वङ्माक्षिकग्रन्थिकदेवदारूणां पृथक्पृथग्भागानां द्विपलिकानां चूर्णं कुर्यात्। तदनन्तरं मण्डूरं गृहीत्वा शुद्धमञ्जनसन्निभं चूर्णं कृत्वाऽष्टगुणे गोमूत्रे पक्त्वा तस्मिन् तच्चूर्णं प्रक्षिपेत् । अनन्तरमुदुम्बरसमान् वटकान् भोजने उपयुञ्जीत । एते वटकाः पाण्डुरोगिणां प्राणदास्तथा कुष्ठाऽजीर्णशोथोरुस्तम्भाऽर्शःकामलामेहप्लीहादिरोगेषु चोपयुज्यन्ते** ( चचि. १६.७२-७७ )

मंडूर वटक नावाचे सिद्ध औषध. हे औषध पांडुरोग्यांना उपयोगी आहे. तसेच कुष्ठ, अजीर्ण, शोथ, ऊरुस्तंभ, मूळव्याध, कावीळ, मेह, प्लीहा इत्यादी रोगांचे विकारात योजितात. **निर्माण करण्याची रीति**—गूळ, सुंठ, मंडूर, तिल, ही समप्रमाणात घ्यावीत. त्यात दुप्पट पिंपळी घालून त्याच्या गोळ्या कराव्यात. **दुसरा प्रकार**—त्रिफळा, त्रिकटु, नागरमोथा, वावडिंग, चवक, चित्रक, दारुहळदीची साल, माक्षीक, पिंपळमूळ, देवदार ही सर्व दोन दोन पळे घेऊन चूर्ण करावे. त्यामध्ये आठपट गोमूत्रात अंजनासारखे मऊ आणि काळे तयार केलेले मंडूर मिसळावे. त्याच्या उंबराएवढ्या गोळ्या कराव्या.

**मतङ्ग**–पु., ऋषि० ( काकरेवतीक. ८० ) अनेन **कनीयसा कश्यपपुत्रेण मातङ्गी नाम विद्या पितामहादेव प्राप्ता ।**

मतंगऋषि. कश्यपाच्या या लहान मुलाने पितामह ब्रह्मदेवाकडून मातंगी विद्या संपादन केली.

**मति**–स्त्री., **बुद्धिः** ( सूसू. २.३ ) बुद्धी.

**–दा**–स्त्री., **वनस्पति० ज्योतिष्मती** ( रा. ३.३९५ ) मालकांगोणी.

**सिगृडी** ( रापरि. ४.३१ ) मालकांगोणी.

**–मत्**–वि., **ऊहापोहवित्** ( ड. सुउ. ६३.५ ) उहापोह जाणणारा.

**मत्कुण**–पु., **कीट०** अस्य रुधिरं वज्रद्रावणाख्यमूषालेपनार्थमुपयुज्यते ( र. १०.२१-२२; असंउ. १ ) ढेकूण. याचे रक्त हिऱ्याची द्रुति करण्याकरिता मूषालेपाकरिता उपयोगात आणतात.

**मत्त**–वि., **मदयुक्तः** ( चसि. २१.४ ) मदयुक्त, माजयुक्त. पु., **वनस्पति० धत्तूरः** ( र. २६.८-१०; असंसू. ३८.१३; अहृसू. २९.१५ ) धोतरा.

**( मत्ता )**–स्त्री., **सुरा** ( रा. १४.३०१ ) दारू.

**मत्ताक्ष**–पु., **पक्षि० कोकिलः मत्तस्येव रक्ते अक्षिणी यस्य सः च** ( चसि. १२.१९ (१) )

कोकिळा. धुंद झाल्याप्रमाणे ज्याचे डोळे लाल झाले आहेत असा.

**मत्सरिन्**–वि., **परगुणासहनशीलः** ( सुशा. ४.६४ ) दुसऱ्याचे गुण सहन न करणारा.

**मत्स्य**–पु., जलचरप्राणि० **मीनः, अस्य दंशेन विषबाधा भवति** ( चचि. २३.१५५ ) **गुणाः–स्निग्धो वृष्यो बहुदोषो गुरूष्णो मधुरो बल्यो बृंहणः पवननाशनश्च** ( चसू. २७.८२; सुसू. ४६.११८-१२५ )

हिं.—मछली.

**म.—मासा.**

बं.—माछ.

ता.—मीन्.

मासे. जलचर प्राणी याच्या दंशाने विषबाधा होते. माशाचे **गुण**—स्निग्ध, वृष्य, पुष्कळ दोषकारक, गुरु, उष्ण, मधुर, बल्य, बृंहण, वातनाशक.

**( मत्स्या )**–स्त्री., **वनस्पति० पोतकी** ( धपरि. ४.५ ) एक वनस्पती.

**–गन्धा**–स्त्री., **वनस्पति० जलपिप्पली** ( ध. ४.६४ ) पाणपिंपळी.

**महाराष्ट्री** ( रापरि. ४.१२ ) मराठी.

**–ताल**–पु., **मत्स्यशकलः** ( सुसू. ७.१२; अहृसू. २५.१० ) माशाचा खवला.

**–निस्तलनस्नेह**–पु., **मत्स्या भृज्यन्ते येन स्नेहेन सः, तत्र साधिताः पिप्पलीस्त्यजेत्** ( अहृसू. ७.३७ ) मासे भाजण्याचे तेल. यात तळलेली पिंपळी घेऊ नये, उपयोग करू नये.

**–निस्तालन**–न., **पात्र० मत्स्या निस्ताल्यन्ते पच्यन्ते यस्मिन् तत् पात्रमथवा निस्तालनं नाम मत्स्यस्य वसा** ( चसू. २६.८४ )

मासे शिजविण्याचे तळण्याचे भांडे, किंवा माशाची चरबी.

**–पचन**–न., पात्र० मत्स्याः पच्यन्ते यस्मिन् भाण्डे तत् ( अहसू. ७.३६; असंसू. ९.१० )
मासे शिजविण्याचे भांडे.

**–परिपचन**–न., मत्स्याः पच्यन्ते यस्मिन् भाण्डे तत् मत्स्यपरिपचनं तत्र, सिद्धां काकमाचीं नाद्यात्, संस्कारविरुद्धत्वात् ( सुसू. २०.१४ )
मासे उकडण्याचे भांडे. या भांड्यात काकमाची शिजवून खाऊ नये, तो संस्कारविरुद्ध दोष स्वास्थ्याला घातक असतो.

**–पित्ता**–स्त्री., वनस्पति० कटुका ( ध. १.३७ )
कुटकी.

**–भेदिनी**–स्त्री., वनस्पति० कटुका ( रा. ६.५५ )
कुटकी.

**–मांस**–न., मत्स्यानां मांसम् मांसमेतद्गर्भिण्या निषिद्धम्, भक्षणाच्च सा चिरनिमेषं स्तब्धाक्षं वा सुतं सूते ( असंशा. २.६१ (५८) )
माशाचे मांस हे गर्भिणीला निषिद्ध होय. तिने खाल्ले तर ज्याचे डोळे दीर्घकाल मिटलेले किंवा ताठलेलेच राहातात असा मुलगा होतो.

**–मांसनीत्या**–स्त्री., मत्स्यमांसस्य नित्यसेवनं कुर्वाणा सा स्तब्धाक्षमपत्यं जनयति ( चशा. ८.२१ )
रोज माशाचे मांस खाणारी. हिला ताठ डोळे असलेली संतती होते.

**–शकला**–स्त्री., वनस्पति० कटुका ( ध. १.३७ )
कुटकी.

**–शकलोपम**–वि., मत्स्यत्वक्सदृशम् (चचि. ७.२१)
माशाच्या खवल्यांप्रमाणे.

**–सत्त्व**–पु., अनवस्थित्यादिभिर्मत्स्यसत्त्वोपलक्षितैरुपेतः पुरुषः ( सुशा. ४.९६ )
मत्स्यसत्त्व. चंचलचित्त, भित्रा, पाण्याची हाव असणारा व सजातीयाचा द्वेष करणारा पुरुष मत्स्यसत्त्व म्हटला आहे.

**–सात्म्य**–वि., अभ्यासान्मत्स्यसात्म्यतां गतः ( चचि. ३०.३१७ )
माशाचे खाद्य सात्म्य–संवय असलेला. नेहमी मासे खाणारा. ज्याला मासे मानवले आहेत असा.

**मत्स्यक**–स्त्री., ह्रस्वमत्स्यः ( चशा. ८.१९ )
माशासारखा भिंतीवरील किडा. लहान मासा.

**मत्स्यण्डिका**–स्त्री., गुडस्य संस्कारः, द्रवखण्डः गुणाः–शीताः स्निग्धा गुरुतरा मधुरतरा वृष्या रक्तपित्तप्रशमनास्तृष्णाप्रशमनाश्च ( सुसू. ४५.१६२; चसू. २७.२४० ) शर्कराभेदः, मन्दं स्यन्दमानः पक्व इक्षुरसः ( भा. प्र. ) भेदिनी, बल्या, लघ्वी च ( र. १७.४८-५०; ध. २.१०४; असंचि. ४; अहसू. ५.४९ ) खडीसाखर.

**खडीसाखरेचे गुण**—शीत, स्निग्ध, पचावयास फार जड, अतिशय गोड, वृष्य, रक्तपित्तनाशक, तहाननाशक आहे.

**मत्स्याक्षक**–पु., वनस्पति० ब्राह्मी (सुशा. १०.६८-७०)
ब्राह्मी.

**(मत्स्याक्षिका)**–स्त्री., मीननेत्रसमाकारा तिक्तसूक्ष्मपत्रा भूमौ किञ्चित्प्रसरणशीलाऽतिक्षुद्रक्षुपा पल्वलसंनिहितदेश उत्पद्यते ( र. २.१९ )
मत्स्याक्षिका. माशाचे डोळ्याप्रमाणे आकार असणारी वनस्पती. कडू, सूक्ष्म पाने असणारी, जमिनीवर किंचित पसरणारी, अति लहान झुडुप डबक्याचे आजूबाजूला फार असते.
वनस्पति० गण्डदूर्वा ( ध. ४.१४५ ) गण्डदूर्वा.

**मत्स्याक्षी**–स्त्री., वनस्पति० ब्राह्मी ( रापरि. ५.४१ )
ब्राह्मी.
मीनाक्षी ( र. ११.५२-५७ ) ब्राह्मी.
गडण्दूर्वा-(रा. ८.३४) गुणाः–तिक्ता कषाया स्वाद्वी कटुविपाकिनी लघुः शीता ग्रहिणी कुष्ठपित्तकफरक्तहारिणी च ( र. १९.१०३-१०६ )
गण्डदूर्वा. **गुण**—कडु, तुरट, गोड, पचनानंतर तिखट, लघु, शीत, संग्राहि, कुष्ठ, पित्त, कफ, रक्तशामक आहेत.
काकमाची ( रा. ४.३६ ) कावळी.

**मत्स्याख्यक**–पु., वनस्पति० ऐन्द्रीभेदः ( चचि. १. (३).२४ ) कवंडळ, कडुइंद्रावण.

**मत्स्याण्ड**–न., मत्स्यस्याण्डम् ( सुचि. १८.२५ )
माशाचे अंडे

**मत्स्याण्डजाल**–न., मत्स्याण्डजालनिभमिति उपमार्थे गृहीतम् (असंउ. ३५) शारीरविकृतघटक० मत्स्याण्डजालनिभं मेदः
इंद्रबस्ति मर्माच्या खाली किंवा वर माशाच्या अंड्याच्या जाळ्यासारखा असणारा (गंडमाळा रोगात) विकृतमेद.

**मत्स्यादनी**–स्त्री., वनस्पति० जलपिप्पली ( ध. ४.६४ )
जलपिप्पली.

कीट० मक्षिकाभेदः ( सुक. ८.३५ )
माशीचा प्रकार.
कुधान्य० ( सुसू. ४६.२१ ) हलक्या जातीचे धान्य.

**मधूषित**–न., वनस्पति० सिक्थकम् ( रा. १३.१७४ )
मेण.

**मध्य**–न., प्रकरणादिदं जम्ब्वाम्रयोरष्ठीलामध्यमिति जज्जटः ( चचि. ३०.९० )
आठळी. जांभूळ, आंबा यांची बी.

**( मध्या )**–स्त्री., वनस्पति० ब्राह्मी (रा.५.१४९) ब्राह्मी.

**–काल**–पु., भैषज्यकाल० मध्यभोजनः ( चचि. ३०.२९९ ) औषधकाल. भोजनाचा मध्य.

**–भक्त**–न., भैषज्यकाल० मध्येभक्तम् ( असंसू. २३.१५ )
अर्धे जेवण होताच, जेवणाचे मध्ये. औषधाची वेळ.

**मध्यन्दिन**–पु., वनस्पति० बन्धूकः ( रापरि. १०.३५ )
दुपारी नावाची वनस्पती.

**मध्यमपञ्चमूल**–न., बला-पुनर्नवा-एरण्डशूर्पपर्णीद्वयं ( च. ध. ७.१८; अहृसू. ६.१६९ )
मध्यमपंचमूळे. चिकणा पुनर्नवा, एरंड, सालवण, पिठवण, यांची मुळे.

**मध्यमा**–( पादस्य )–स्त्री., शारीर० प्रदेशिन्याः सकाशान्मध्यमाऽङ्गुलीपञ्चमभागहीना ( सुसू. ३५.१२ )
मधले बोट.

**मध्यमाङ्गुलि**–स्त्री., पञ्चसु मध्यमा, अङ्गुष्ठात् तृतीयाङ्गुलिः ( सुचि. ३५.७ ) मधले बोट.
तस्याः प्रमाणं पञ्चाङ्गुला, इदं दीर्घायुःपुरुषलक्षणम् ( सुसू. ३५.१२ )
मधले बोट. मधल्या बोटाचे प्रमाण, पांच अंगुळे.

**मध्याह्न**–पु., दिनमध्यभागः ( सुसू. ६.१४ )
दिवसाचा मध्य, दुपार.

**मध्येभक्त**–न., यद् भक्तस्य नाम भोजनस्य मध्ये पीयते इदं अविप्रसरणस्व भावात्कोष्ठगतान् रोगान् हन्ति ( सुउ. ६४.७१-७२ )
जेवणाचे मध्ये घेतलेले औषध. हे इतरत्र न पसरल्याने कोष्ठातील रोग नष्ट करते.

**मध्वरिष्ट**–पु., योग० विडङ्गपिप्पलीत्वक्क्षीरीकेशरमरिचादियुक्तः ग्रहण्यां शस्तः (चचि. १५.१६३-१६७)
मधाचे अरिष्ट. वावडिंग, पिंपळी, दालचिनी, मिरी इत्यादींनी युक्त ग्रहणीरोगात उत्तम.

**मध्वाम**–न., मधुनः आमम्, मध्वाममुपक्रमविरोधित्वान्मानवं सद्यो हन्ति। आमे उष्णा क्रिया क्रियते तत् मध्वामे विरुद्धा; यत्तु मधु हितं शीतं तदामे विरुद्धं, तस्माद्दारुणं मध्वामम्। महात्ययं दुश्चिकित्स्यं च ( चसू. २७.२४७ ) मधाचा आम.
हा मधाचा आम चिकित्सेला सुलभ नसल्याने केव्हा केव्हा माणसाचे मृत्यूला कारण होतो. कारण आमाला उष्ण चिकित्सा करावयाची परंतु मधाला ती विरुद्ध. मधाचे गुणांप्रमाणे शीतचिकित्सा करावयाची तर आमाला विरोध करणारी.
मध्वजीर्णम् ( सुसू. ४५.१४७ ) मधाचे अजीर्ण.

**मध्वाम्र**–पु., वनस्पति० चक्रलताम्रः (रा. २१.११)
आंब्याचा मोहोर.

**मध्वालुक**–न., कन्दशाकः, तच्च रोमशं मधुराऽऽस्वादं, गुणाः– रक्तपित्तहरं शीतं मधुरं गुरु बहुशुक्रं स्तन्यवृद्धिकरं च ( सुसू. ४६.२९८-९९ )
गाजर. कंदशाक आहे. स्वादाला चांगला, अंगावर लोम असणारा कंद. गुण– रक्तपित्तनाशक, शीत, मधुर, गुरु, शुक्र आणि स्तन्यवृद्धि करणारी आहे.

**मध्वावास**–पु., आम्रः ( र. ११.३ ) आंबा.

**मध्वासव**–पु., आसुत० ( चसू. २७.१८७ ) गुणाः– लघुश्छेदी मेहकुष्ठविषाऽपहस्तिक्तः कषायः शोफघ्नस्तीक्ष्णः स्वादुः अवातकृच्च (सुसू.४५.१८८-८९;अहृसू.५.७५; असंसू.१०.४८)
मधाचे आसव. **गुण**– हलके, दोषांचे छेदक. प्रमेह, कुष्ठ, विष, सूज नाशक, कडु, तुरट, गोड, तीक्ष्ण, थोडा वात करणारे.

**मनस्**–न., अतीन्द्रियम् ( चसू. ८.४ ) तत्तु सत्त्वसंज्ञकम् तदर्थात्मसंपदायत्तचेष्टं चेष्टाप्रत्ययभूतमिन्द्रियाणाम् ( चसू. ८.४ ) मन आत्मना इन्द्रियैश्च सह संयुक्तं ज्ञानकारणमस्ति। तद्यथा–आत्मा मनसा संयुज्यते मन इन्द्रियेण, इन्द्रियमर्थेनेति ( चक्र. चसू. ८.१२ ) एवं मनसो वैवृत्याज्ज्ञानस्याभावस्तत्सांनिध्याच्च ज्ञानमिति वैवृत्यान्नाम वृत्यभावादसन्निधेरिति यावत्. ज्ञानं ज्ञानाभावश्च मनसो लक्षणम् ( चशा. १.१८-१९ ) मनसो द्वौ गुणावणुत्वमेकत्वं चेति युगपज्ज्ञानानुदयान्मनसो ऽ णुत्वमेकत्वं च सिद्धे भवतः (चक्र. चशा. १.१८-१९) चिन्त्यं विचार्यमूह्यं ध्येयं संकल्प्यं चेति मनोविषयाः। यत्किञ्चिन्मनसो ज्ञेयं तत्सर्वमेव मनोविषय इति संज्ञितम् (चशा. १.२०)

तत्र कर्तव्यतयाऽकर्तव्यतया वा **यन्मनसा चिन्त्यते तच्चिन्त्यम्। उपपत्त्यनुपपत्तिभ्यां यद्विमृश्यते तद्विचार्यम्**, एवमेतद्भविष्यतीति **संभावनया यदूह्यते तदूह्यम्**, भावनाज्ञानविषयं ध्येयम्, **गुणवत्तया दोषवत्तयाऽवधारणविषयं संकल्प्यमिति मनोविचाराणां स्वरूपम्** ( चक्र. चशा. १.२० ) **मनसः कर्माणीन्द्रियाभिग्रहः स्वस्य च निग्रह ऊहो विचारश्चेति** ( चशा. १.२१ ) **मनःपुरःसराणीन्द्रियाण्यर्थग्रहणसमर्थानि भवन्ति** ( चसू. ८.७ ) **मनस्तु नवद्रव्येष्वेकम्** ( चसू १.४८ ) **मनोऽर्थाव्यभिचरणेन परीक्षेत** ( चवि. ४.८ )

**मन**—हे अतीन्द्रिय आहे. ते चक्षु इ० इंद्रियांना गोचर होत नाही. त्याला सत्त्व असेही म्हणतात. मनाचे सुखदुःखादि चिंतनीय विषय आणि प्रयत्नादि प्रवृत्ति ही आत्मगुण संपत्ति यांवर स्वामित्व ठेवणारे मन हे चक्षुरादि इंद्रियांच्या कार्यांचा साक्षात्कार घडवण्यास कारणीभूत असते. मन आत्मा आणि इंद्रियाशी संयुक्त होऊन ज्ञानाचे कारण होत, असते जरी— आत्मा मनाशी, मन इंद्रियांशी आणि इंद्रिये त्यांच्या विषयाशी संयुक्त होतात. याप्रमाणे मन विषयाशी संलग्न नसले तर ज्ञान होत नाही व संलग्न असले तरच ज्ञान होते. आत्मा, इंद्रिये आणि इंद्रियांचे विषय यांचे सांनिध्य असताना ज्ञान उत्पन्न होणे आणि न होणे हे मनाचे लक्षण आहे. अणुत्व आणि एकत्व असे मनाचे दोन गुण आहेत. एकसमयावच्छेदेकरून निरनिराळ्या इंद्रियांचे ज्ञान ग्रहण होणे शक्य नसल्यामुळेच मनाचे एकत्व आणि अणुत्व सिद्ध होते. चिंतनीय, विचारणीय, उहापोह करण्याजोगे, दृष्टीसमोर ध्येय म्हणून ठेवण्याजोगे आणि योजना करण्यास पात्र असे सर्व विषय मनाचे होत. मनाला जाणण्याजोगे जे असते ते त्याचा विषय म्हटले जाते. कोणतीही गोष्ट करायची की नाही हा मनाचा चिंतनीय विषय; म्हणून त्याला **चिंत्य** म्हणावयाचे. संगति लागते की नाही हा निर्णय घेणे याला **विचार्य** म्हणावयाचे. अमुक गोष्ट अशी ह्या कारणामुळे घडेल असे वाटते अशा उहापोहाला **ऊह्य** म्हणावयाचे. भावना जाणून घेण्याचा विषय म्हणजे **ध्येय.**—गुण आणि दोषांच्या दृष्टीने एखाद्या गोष्टीचा विचार करणे याला **संकल्प्य** म्हणावयाचे. याप्रमाणे मनोविचारांचे हे स्वरूप आहे.

**मनाची कर्मे**—इंद्रियांमध्ये प्रवेश करणे, स्वतःचे संयमन, उहापोह आणि विचार करणे. सर्वही इंद्रिये मनाच्या पुरस्कारानेच आपापल्या विषयांचे ग्रहण करीत असतात. नऊ द्रव्यांपैकी मन हे एक द्रव्य आहे. निरनिराळ्या वेळी निरनिराळ्या विषयाकडे होणाऱ्या प्रवृत्तीवरून त्या त्या इंद्रियात मन आहे अशी मनाची परीक्षा करावी.

**खनिज० मनःशिला** ( र. १२.१२१-२२ ) मनशीळ.

**–कर**–वि., **मनोगुणकरणम्** ( चक्र. चसू. १.१०७ ) मनाचे गुण करणे.

**–कान्त**–वि., **मनःप्रियम्** ( सुसू. ३४.२२-२३ ) मनाला आवडणारे.

**–( मनः )–पुरःसर**–वि., **मनोऽधिष्ठितम्** ( चसू. ८.७ ) मन ज्यावर अधिष्ठित आहे ते.

**–प्रसाद**–पु., **चित्तप्रसन्नता** ( असंसू. २७.१९ ) मनाची प्रसन्नता.

**–शय**–पु., **मनसि शेते इति मनःशयः मनसिजः कामः** ( चचि. २.(१). १० ) मनाचे ठिकाणी असणारा कामविकार.

**–शिला**–स्त्री., **खनिज० तद्गुणाः–कटुस्तिक्तोष्णा स्निग्धा, लेखनी, सर्वरसायनाग्र्या, कफवातहन्त्री, विषभूताऽऽवेशभयोन्मादनाशिनी** ( ध. ३.९६ ) **कुष्ठादिहरप्रदेहे दद्रुप्रभृतित्वग्रोगहरणेऽवचूर्णनार्थं चोपयुज्यते** ( चसू. ३.५,१० ) **उपदंशविसर्पाणां शान्तिकारिणी** ( सुचि. १९.४६-४७ ) **व्रणेषूत्सन्नमांसेषु मांसस्फोटनार्थं, व्रणसंशोधनवर्तिकल्कघृततैलेषूपयुज्यते** ( सुसू. ३७.१४,३१-३३ ) **नेत्ररोगे बर्त्यञ्जनाद्युपदिष्टानामेकतमं द्रव्यम्** (सुउ.११.८) **मनःशिलादोषाः–बलमांद्यं, पाण्डुतां, मूत्ररोधं, शर्करां च करोति**( ध. ३.१०० ) **अशुद्धमनःशिलासेवनेनाऽश्मरीमूत्रकृच्छ्राऽग्निमांद्यमलावरोधाभवन्ति** ( र. ३.१०२ ) **तद्भेदाः–श्यामिकाकणवीरकाखण्डपूर्विकाश्चेति** (र. ३.९६) **तस्याः शोधनम्–अगस्त्यपत्ररसेन, शृङ्गवेररसेन वा सप्तवारं भाविता मनःशिला शुध्यति** ( र. ३.१०३-४ )**तत्सत्त्वपातनविधिः–साऽष्टमांशेन लोहकिट्टेन गुडगुग्गुलसर्पिषा च युक्ता कोष्ठ्यां रुध्वा दृढं ध्माता सत्त्वं मुञ्चेत्** ( र. ३.१०५-७ )

मनशीळ. खनिजद्रव्य. याचे गुण—तिखट, कडु, उष्ण, स्निग्ध, दोष खरडून काढणारी, सर्व रसायनांमध्ये श्रेष्ठ, कफवातशामक, विष, भूतबाधा, उन्माद, वगैरे विकार नाहीसे करणारी.

कुष्ठनाशक लेपात तसेच गजकर्ण, नायटे इत्यादी त्वचेच्या विकारांचे नाशक, वरून भुरभुरण्यासाठी उपयोगी. उपदंश, विसर्प विकारात उपयोगी. जखमेमध्ये वर चालून आलेल्या मांसाला झरवून कमी करणारी, व्रणाचे शोधन करणाऱ्या वर्ति-कल्क-घृत-तैल या चिकित्साकार्यात उपयोगी. नेत्ररोगात वात करून अंजनासाठी उपयोगी. अयोग्य तऱ्हेने उपयोजिलीतर **मनःशिलेचे दोष**-बल कमी करणे, पांडुता उत्पन्न करणे; मूत्रावरोध, मुतखडा किंवा रेव उत्पन्न करणे.

**अशुध्द मनशिलेचे दोष**—मूत्रकृच्छ्र म्हणजे कष्टाने लघ्वी होते. अग्निमांद्य व मलावरोध उत्पन्न होतो.

**मनशिळेचे भेद**—श्यामिका, कणवीरका, खण्डपूर्विका.

**मनशिळेची शुद्धि**—हदग्याच्या पानाच्या स्वरसाने किंवा आल्याच्या रसाने सात वेळा भावना दिली की मनशिळ शुद्ध होते.

**सत्त्वपातन**—मनशिळेच्या ⅛ भाग लोहकिट्ट, गूळ, गुग्गुळ, व तूप एकत्र घोटून कोठीत घालून तीक्ष्णाग्नीची आच दिली असता सत्त्व वेगळे होते.

**-शुद्धि**-स्त्री., **लक्षण० मनसः इन्द्रियार्थग्रहणे पाटवम्** ( चसू १६.६ )
मनाचे दोष नष्ट होऊन इंद्रियांचे ते ते विषय ग्रहण करण्याची मनाची शक्ति उत्तम असणे.

**-संकल्प**-पु., **चिन्तनम्, मनसः कर्म** (ड. सुशा. १.१७) चिंतन, मनाचे कर्म.

**-संताप**- पु., **मानसदुःखम्, त्रासः** ( चचि. ३०. २३३;३६ )
मानसिक दुःख, मन त्रस्त होणे. त्रास.

**( मनो )-गुप्ता**-स्त्री., **खनिज० मनःशिला** ( ध. ३.९६ ) मनशीळ.

**-जव**-पु., **मनसा जवते गच्छतीति मानसवेगः** ( चशा. २.३१ ) मनाचा वेग. मनाबरोबर जो जातो तो ( आत्मा ).

**-जवृद्धि**-स्त्री., **वनस्पति० कामवृद्धिः** ( रापरि. ४.५१ )
कर्नाटकात प्रसिद्ध वनस्पतिविशेष. हिचे बी कामोत्तेजक आहे.

**-ज्ञ**-वि., **मनःप्रियम्** (चचि. ८.१६२) **मनोऽनुकूलम्** ( सुशा. ४.४६ )
मनाला आवडणारे, मनाला अनुकूल.

पु., **वनस्पति० कुन्दः** ( रा. १०.२५६ )
एक सुगंधी फूल.

न., **वनस्पति० जीरकम्** ( ध. २.६६ ) जिरे.

**(-ज्ञा)**-स्त्री., **वनस्पति० आवर्तकी** ( रा. ३.२९६ )
चांभारआवळी.
**उपकुञ्ची** ( रा. ६.९१ ) मोठे जिरे.
**कर्कोटकी** ( ध. १.१८७ ) कर्टोले.
**जाती** ( ध. ५.१३७ ) जाई.
**वन्ध्यकर्कोटकी** ( ध. १.१८५ ) वांझकटोले.
**आसुत० सुरा** ( रा. १४.३०३ ) दारू.
**खनिज० मनःशिला** ( ध. ३.९६ ) मनशीळ.

**-ज्वर**-पु., **रोग० मानसो ज्वरः** ( असंशा. ४.५१ )
मनाचा ताप, मानसज्वर.

**-दैन्य**-न., **लक्षण० क्लिष्टचित्तत्वम्, विषण्णमनस्त्वम्** ( सुउ. ५७.१७ )
मनाची विषण्णता; विषादत्व, मनाची खिन्नता.

**-दोष**-पु., **मानसावगुणाः** ( अहसू. १.२६ )
मनाचे दोष.

**-धात्री**-स्त्री., **खनिज० मनःशिला** ( र. १२.१२१,२२ ) मनशीळ.

**-रम**-वि., **रुचिजनकम्** ( सुसू. ४६.४५४ )
मनोरम, आनंददायक, रुचि उत्पन्न करणारे.

**(-रमा)**-स्त्री., **भैषज्य० गोरोचना** ( रा. १२.३४ )
गोरोचन.

**-वह**-वि., **मनोवाहि ( स्रोतः )** ( चनि. ७.४ )
मनोवहस्रोतस.

**-वहस्रोतस्**-न., **मनोवहनमार्गः, मनोवहानि स्रोतांसि यद्यपि पृथङ्नोक्तानि तथाऽपि मनसः 'केवलं चेतनावच्छरीरमयनभूतं' इत्यभिधानात्सर्वशरीरस्रोतांसि गृह्यन्ते, विशेषेण तु हृदयाश्रितत्वान्मनसस्तदाश्रिता दश धमन्यो मनोवहाः अभिधीयन्ते** ( चक्र. चइ. ५.४१ ) **हृदयदेशसंबन्धिधमनी विशेषेण मनोवहा** ( चचि. ९.५ )
मनोवह स्रोतस. मनोवह स्रोतसे जरी वेगळी सांगितली नसली तरी सर्व सचेतन शरीर हे मनाचे कार्यक्षेत्र असल्यामुळे मन सर्व स्रोतसात जाऊ शकते. मन हे हृदयाश्रित असल्यामुळे हृदयाश्रित दहा धमन्या मनोवाहि स्रोतसे समजल्या जातात.

**-विकार**-पु., **रोग० उन्मादोऽपस्मारश्च** ( चक्र. चचि. ३.३०९ )
मनाचे रोग, उन्माद, अपस्मार.

**–विपर्यय**–पु., **लक्षण० मनोवैपरीत्यम्** ( सुशा. ६.३६-३७ )
मनाची स्थिति बिघडणे.

**–व्याकुलन**–वि., **मनःशान्त्यपहारकम्, मनोव्याकुल्यतेऽनेनेति मनोव्याकुलनम्** (सुशा. ४.४७)
मनःशांति नष्ट करणारे, मनाला व्याकुळ करणारे.

**–समाधि**–पु., **मनसः समाधिः चित्तैकाग्र्यलक्षणावृत्तिः, निषेधरूपा वा शान्तिः** ( चचि. २४.५२ )
मनाची एकाग्रता, शांती.

**–हर**–पु., **वनस्पति० कुन्दः** ( ध. ५.१५० )
सुगंधी फूल.
न., **खनिज० सुवर्णम्** (रा. १३.१) सोने.

**–( हरा )**–स्त्री., **वनस्पति० जाती** (रा. १०.२३१) जाई.
**यूथिका** ( रा. १०.२५२ ) जुई.

**–ह्वा**–स्त्री., **खनिज० मनःशिला** ( ध. ३.९६; सुचि. २५.३८ ) मनशीळ.

**मनस्विन्**–वि., **प्रशस्तं मनो यस्य, सः** ( चवि. ८.१०४ )
मानी, विचारी. प्रशस्त मनाचा.

**( मनस्विनी )**–स्त्री., **वनस्पति० कर्कोटकी** ( रा. ७.२७६ ) कर्टोले.

**मनीषिन्**–पु., **विवेकशाली मुनिः** ( चइ. ९.१८ )
विवेकशाली, साधु, मुनि.

**मनु**–पु., **प्रजापतिः** ( सुसू. ५.२५ )
प्रजापति, तपस्वी.
**वनस्पति० स्पृक्का** ( रा. १२.११३ )
स्पृक्का, बाफळी.

**मनुष्य**–पु., **मानवः** ( चशा. ३.१५ ) माणूस.

**–बिम्ब**–पु. न., **मनुष्याकारः** ( चशा. ३.१६ )
मनुष्याचा आकार.

**–विग्रह**–पु., **पुरुषदेहो, मानवदेहः** ( चशा. ३.१६ )
मानवदेह.

**मनोऽभिताप**–पु., **मनःसंतापः** ( चशा. २.७ )
मनस्ताप.

**मन्तृ**–पु., **आत्मा** ( चशा. ४.८ ) आत्मा.

**मन्त्र**–पु., **उपक्रम० मन्त्रोपचारः** ( चसू. १८.५ )
**अथर्ववेदे चिकित्सा** ( चसू. ३०.२१ )
**अक्षरसमूह० यस्योच्चारेण व्याधिरुपशाम्यति देवादयश्च प्रसन्ना भवन्ति** ( चनि. ७.१६ ) **सर्पविषे मन्त्रप्रयोगः क्रियते** ( सुक. ५.१० )
मन्त्र. मन्त्रोपचार, चिकित्सा, अथर्ववेदात मंत्रचिकित्सा आहे. विशिष्ट असा अक्षरसमूह उच्चारला असताना रोगशांती होते आणि ज्याने देव प्रसन्न होतात, तो अक्षरसमूह म्हणजे मंत्र. सर्पविषचिकित्सेत मंत्राचा प्रयोग सांगितला आहे.

**–कोविद**–पु., **मन्त्रज्ञः पुरुषः** ( ड. सुक. ५.८ )
मांत्रिक. मंत्र जाणणारा.

**–देवता**–स्त्री., **मन्त्रस्य देवता** ( असंसू. ९.१२१ )
मंत्राची देवता.

**–पूताम्बु**–न., **मन्त्रेण पवित्रीकृतं जलं, तस्य प्रोक्षणाद्विषशमनं भवति** ( चचि. २३.२२३ )
मंतरलेले पाणी. ते शिंपडले असता विषशमन होते.

**–विशारद**–वि., **मन्त्राणामृग्यजुःसामोक्तानामथर्ववेदोक्तानां च पण्डितः** ( ड. सुसू. ३४.७ )
मंत्रविशारद, ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद यातील मंत्रांचा ज्ञाता, पंडीत.

**मन्त्राभिमन्त्रित**–वि., **मन्त्रैरभिमन्त्रितम्** (अहसू.१८.१५) मंत्रांनी अभिमंत्रित केलेले. मंतरलेले.

**मन्थ**–पु., **कल्प०** ( चचि. ४.५९ ) **जलघृताक्तसक्तुः** ( ड. सुउ. ६४.४४ ) **सर्पिषाऽभ्यक्ताः शीतवारिपरिप्लुता नातिद्रवा नातिसान्द्रा सक्तवो मन्थ इत्युपदिश्यते । स च सद्योबलकरः पिपासाश्रमनाशनः** ( सुसू. ४६.३८५-३८६ ) **तद्गुणाः–शीतः, पित्तघ्नो दाहारुचिमूर्च्छाश्रमनाशनः** ( ध. ७.४७ ) **तृष्णाजोदावर्तशमनः** ( सुउ. ५५.३४ )
मन्थ–औषधिकल्प. तूप घालून जवाचे पीठ पाण्यात कालवून फार घट्ट नाही फार पातळ नाही अशा स्वरूपात पेय केले की त्याला मंथ म्हणतात. तो ताबडतोब बलदायक आहे. त्याचे गुण– शीत, पित्तनाशक, दाह, अरुचि, मूर्च्छा, तहान, व श्रमनाशक असे आहेत. तहान लागली व तिचा अवरोध केला तर होणाऱ्या उदावर्त विकारास दूर करण्यासाठी उपयोगी.
**वनस्पति० अग्निमन्थः** ( र. १२.७४ ) अरणी.
**नेत्ररोग० अधिमन्थः** ( सुउ. १.३७ ) डोळे येणे.

**–हत**–वि., **खजविलोडितम्** ( सुउ. ४१.५२ )
रवीने घुसळलेले.

**मन्थन**–पु., **वनस्पति० अग्निमन्थः** ( ध. १.१११ )
अरणी.
न., **लक्षण० शरीरमन्थनवद् वेदना** ( चचि.६.७७; सुउ. ६.१२ ) शरीर घुसळल्याप्रमाणे वेदना होणे.

**मन्थनोद्भव**–न., **आहारद्रव्य० नवनीतम्** (ध. ६.२२९)
लोणी.

**मन्थान**–पु., मन्थनदण्डः ( चसू. ११.२४ ) रवी.
वनस्पति० आरग्वधः ( रा. ९.३३३ ) बहावा.

**–भैरव**–पु., पारदयोग० पारदताम्रतालहिंग्वादि-साधितोऽयं कफरोगादिघ्नः ( र. १३.७६-७८ )
सिद्ध औषधाचे नाव. पारा, तांबे, हरताळ इ० युक्त कफरोग इ० नाशक.
प्राचीनरसाचार्यः (र.१८.१७२) प्राचीनरस शास्त्रज्ञ.
रसरत्नसमुच्चयकर्त्रा सिंहगुप्तसूनुनाऽऽलोचित-स्तन्त्रकर्ता ( र. १.५-९ )
रसरत्न-समुच्चय ग्रंथाच्या कर्त्याने–सिंहगुप्ताच्या मुलाने पाहिलेला ग्रंथकार.

**मन्थानक**–पु., वनस्पति० तद्गुणाः–मधुरः, स्निग्धो दोग्धा, बहुवीर्यकः तृणविशेषः ( रापरि. ८.५५ )
बळकट मुळाचे हिरवे गवत. गोड, स्निग्ध, दूध वाढवणारे, पुष्कळ वीर्याचे.

**मन्द**–पु., गुण० तीक्ष्णविपरीतः शनैः कार्यकारी गुणः (चशा. ६.१०) अस्य शमने शक्तिः ( अहृसू. १.१८)
वीस गुणांपैकी एक गुण, तीक्ष्णाच्या विपरीत. हळु-हळु कार्यकारी होणारा गुण. शमन करणारा.

**–कफ**–वि., लक्षण० न्यूनकफः ( चसि. १.९ )
कमी कफ असलेला.

**–कर्मन्**–वि., अलसः ( सुसू. ४६.४४४ ) आळशी.

**–गन्ध**–पु., वनस्पति० सप्तपर्णः ( रा. १२.१३९ )
सप्तपर्णी.

**–चेष्टता** स्त्री., लक्षण० मन्दकायव्यापारता ( सुसू. १५.७ ) शरिराची हालचाल मंदावणे.

**–जरस्**–वि., लक्षण० यस्य वार्धक्यं मन्दं चिरेण जायते सः पुरुषः ( चवि. ८.१११ )
ज्याला उशीरा म्हातारपण येते तो.

**–ता**–स्त्री., लक्षण० जिह्मता,कौटिल्यम् (सुशा.४.९५)
कुटिलत्व, वाकडेपणा.

**–तेजस्**–वि., लक्षण० मन्दतेजस्कम्, अल्पप्रभावम् ( अहृसू. ७.१७ )
कमी तेजाचा, थोडा प्रभाव असलेला, मंद तेजाचा.

**–रुज्**–वि., लक्षण० मन्दवेदनम् ( चचि. २८.३६ )
सौम्य वेदना असलेला.

**–लवण**–वि., ईषल्लवणम् ( चचि. १७.१०७ )
थोडे खारट.

**–वार**–पु.,शनिवासरः ( र. २०.१९६ ) शनिवार.

**–विकार**–वि., अल्पविकारयुक्तः ( चवि. ८.१११ )
थोड्या विकाराने युक्त.

**–विभ्रंशा**–वि., मन्दं स्वल्पो विभ्रंशो कर्षणम् यस्यां, सा मन्दविभ्रंशा मात्रा,मध्यमा मात्रा(चसू.१३.३७)
दोषांचा भ्रंश बेताने करणारी मात्रा ( मध्यम मात्रा ).

**–सरण**–न., ( परिव० ) शनैर्विसर्पणम् (सुनि.१०.६)
उशीरा पसरणे. सावकाश पसरणे.

**–स्तनित**–वि., मधुरशब्दो मेघादिः 'स्तनितं मेघगर्जितम्' इति कोशात् ( असंसू. ४.४१ )
मेघांचा सौम्य गडगडाट.

**–हुतभुज्**–वि., मन्दाग्निः ( र. १६.१६२ )
मंदाग्नी असणारा.

**मन्दक**–पु., न., आहारद्रव्य० दधिभेदः ( चचि. २१.१८ ) क्षीरविकृतिः, यदा क्षीरं विक्रियामापन्नं घनत्वं न याति, तदा तन्मन्दकम्, त्रिदोषकरमिदम् ( चसू. २७.२२८ )
अदमुरे दही. दुधाला विरजण लागून दाट नसलेले अर्धवट झालेले दही. विरजलेले दूध जे घट्ट होत नाही ते मंदक होय. ते त्रिदोषांचा कोप करणारे आहे.

**मन्दाग्निता**–स्त्री., लक्षण० अग्निमान्द्यम् (सुसू. १५.९)
द्र० 'अग्निमांद्य' अग्निमांद्य.

**मन्दानल**–वि., लक्षण० मन्दाग्निः ( सुसू. ४६.४४४ )
मंदाग्नि असलेला.

**मन्दार**–पु., वनस्पति० पारिभद्रः ( रापरि. ८.१०; असंउ. ४२ ) पारिजातक.
राजार्कः ( ध. ४.१६ ) पांढरी रुई.

**मन्दारोग्य**–वि., रोगी ( सुसू. ४६.४४४ )
बेताचेच आरोग्य असलेला.

**मन्दाशित**–वि., अल्पाशितः ( का भोजनकल्प. )
थोडे खाणारा. थोडे खाल्ले आहे असा.

**मन्दोष्मता**–स्त्री., मन्दौष्ण्यम् ( सुसू. १५.७ )
मन्द उष्णता.

**मन्मथानन्द**–पु., वनस्पति० राजाम्रः ( रा. ११.११ )
नामांकित आंबा.

**मन्मथालय**–पु., वनस्पति० आम्रः ( रा. ११.२ )
आंबा.

**मन्मथावास**–पु., वनस्पति० राजाम्रः ( रा. ११.९ )
नामांकित आंबा.

**मन्मथोद्भवन**–पु., वनस्पति० राजाम्रः ( ध. ५.११ ) नामांकित आंबा.

**मन्या**–स्त्री., शारीर० धमनीमर्म० ( सुशा. ६.२७ ) ग्रीवासिराद्वयम् ( चक्र. चचि. ९.८४ ) ग्रीवापश्चिमभागस्था धमनी ( ड. सुनि. ११.१० )
एक धमनीमर्म. मानेच्या दोन शिरा. मानेच्या पाठीमागची धमनी.

–ग्रह–पु., लक्षण० मन्यास्तम्भः ( चसू. १७.१४; सुनि. १.७२ ) द्र० 'मन्यास्तम्भ'
मानेचा स्तंभ, मान ताठरणे.

–शूल–पु., लक्षण० ग्रीवायाः पश्चाद्भागो मन्या, तत्र भवः शूलः ( चनि. ३.७ ) मानेचा शूल.

–स्तम्भ–पु., रोग० मन्यायाः क्रियाहानिः अशीतिवातविकारेष्वेकः ( चसू. २०.११; सुनि. १.६७ ) तत्संप्राप्तिः– मन्ये संश्रितो वातो यदा अन्तर्नाडीः प्रपद्यते, तदा मन्यास्तम्भं कुर्यात् (चचि. २८.४३) अयं श्लेष्मणाऽऽवृतेन वातेन जन्यते ( मा. चसू.५.५९ ) अयं शिरोविरेचनार्हः ( चसि. २.२२ )
मानेची हालचाल न होणे. जखडणे. ऐशी वातविकारातील एक. मानेतील दुष्ट वात आतल्या धमनीत जातो तेव्हा हा होतो. हा कफावृत वाताने होतो. याला डोक्याचे रेचक योग्य.

**मयष्ट**–पु., वनस्पति० मकुष्ठकः ( रा. १६. १४५ ) मठ, मटकी.

**मयूर**–पु., पक्षि० बर्ही ( चसू. २७.६५ ) तन्मांसगुणाः–मधुरं, कषायं, लवणं, सुस्निग्धं, शुक्रलं, बल्यं, मेधाकरं, स्वर्यम् ( ध. ६.४४५ ) त्वच्यं, केश्यमरुचौ हितमग्निदृक्श्रोत्रेन्द्रियदार्ढ्यकृत् ( सुसू. ४६.६४-६५ )
मोर. मोराचे मांस. मधुर, तुरट, लवण, बरेच स्निग्ध, शुक्रवर्धक, बलवर्धक, बुद्धिवर्धक, आवाज सुधारणारे आहे. त्वचा, केस, रुचि, यांना हितकर. जठराग्नि, दृष्टि व कान यांना बलकर.
वनस्पति० अपामार्गः ( र. ५.१७१-७२) आघाडा.

–कण्ठप्रतिम–वि., मयूरकण्ठतुल्यः ( सुक. १.२९,३० ) मोराच्या कंठाप्रमाणे.

–कण्ठाभ–वि., मयूरकण्ठतुल्यः ( असंसू. ८.२४) मोराच्या कंठासारखा.

–ग्रीवक–न., खनिज० तुत्थकम् ( ध. ३.१४५ ) मोरचूद.

–चन्द्रिका–स्त्री. मयूरपिच्छस्थितः चित्रविचित्रवर्णः ( र. १.७२ )
मोरपिसावरील चित्रविचित्र वर्णाप्रमाणे चमकदार.

–चूड–न., वनस्पति० स्थौणेयम् ( रा. १२.१२५ ) दगडफूल.

–जङ्घ–पु., वनस्पति० टिण्टुकः (ध. १.११४ ) टेंटु.

–तुत्थ–न., खनिज० तुत्थकम् ( रा., १३.२०५ ) मोरचूद.

–पादनाल–न., मयूरपिच्छस्यैव नालम् ( चचि. १७.११७ ) मोराच्या पिसाची नळी.

–पिच्छ–न., चन्द्रको नाम मयूरस्य पिच्छम् ( र. २३.६ ) भस्मीकृतं श्वासकासयोः केवलं वा धूपनार्थं प्रयुज्यते ( र. २१.६०-६२ )
मोरपीस–भस्म करून श्वास, कासावर उपयोगी; धूप देण्यासाठीही उपयुक्त.

–वसा–स्त्री., मयूरस्य वसा सेयं नेत्ररोगेष्वञ्जनार्थमुपयुज्यते ( असंउ. १६ )
मोराची वसा. नेत्ररोगात अंजनाकरिता उपयोगी.

**मयूरक**–पु., वनस्पति० अपामार्गः ( चचि. १२.२३; सुचि. ५.७; ध. १.२६० ) आघाडा.
अजमोदा ( असंचि. २४ ) ओवा.
वायव्यः कीट० ( असंउ. ४३ ) एक किडा.

**( मयूरिका )**–स्त्री., कीट० तद्गुणाः–वायव्या, वातकोपना सती वातरोगान् करोति ( सुक. ८.५-८ )
एक किडा; वातप्रकृतीचा, वातप्रकोपक, वातरोगकारक.
वनस्पति० अम्बष्ठा ( रा. ४.१७० )
पहाडमूल, मोरशिखा.

–सुतुत्थक–न., खनिज० मयूरतुत्थकम् ( र. १४.१-१० ) मोरचूद.

**मरक**–पु., जनपदोध्वंसकरः रोगः ( सुसू. ६.१७ )
जनसमूहनाशक एक रोग; साथीचा एक रोग.

**मरकत**–पु. न., रत्न० ( चचि. २३.२५२-५३ ) गारुत्मतम् ( ध. ६.४९ ) हरिन्मणिः ( र. २.६२) अयं श्वेतारुणपीतनीलभेदाच्चतुर्विधः ( ध. ६.५२ ) तद्गुणाः–मधुरं, शीतं, रुच्यं, पुष्टिदं, विषघ्नं, आमपित्तहरं भूतनाशनं च ( ध. ६.५० )
मरकत. एक रत्न. हिरवे रत्न. हा पांढरा, तांबुस, पिवळा, निळा असा चार प्रकारचा. **गुण**—गोड,

रुचकर, थंड, पौष्टिक, विषनाशक, आमपित्त-हारक, भूतनाशक.

**-पत्री**-स्त्री., **वनस्पति० पाची** ( रापरि. १०.४६ ) पाची, पाच, पाचू.

**मरण**-न., **मृत्युः** ( चसू. ३०.२५ ) मरण.
(परिव०) **भस्मीभवनम्** (र.२.६८-६९) राख होणे.
**वनस्पति० वत्सनाभः** ( ध. ७.१२८ ) बचनाग.

**मरणाख्यलिङ्ग**-न., (परिव०) **रिष्टलिङ्गम्** (चइ.१२.६५) मरणसूचक चिन्हे.

**मरणोदय**-वि., **मरणकारणम्** ( चइ. १.२५ ) मरणाचे कारण.

**मरालिका**-स्त्री., **वनस्पति० सातला** ( ध. १.२३८ ) शिकेकाई.

**मरिच**-न., **वनस्पति० महाकषायवर्गे दीपनीयगणे, कृमिघ्नगणे, शिरोविरेचनोपगगणे, शूलप्रशमनगणे चैकं द्रव्यम्** ( चसू. ४.९,११,१३,१७ ) **तद्गुणाः-कटु तिक्तमुष्णम्; नात्यर्थमुष्णम्** (च.), **लघु, दीपनं, रुचिकरं, पित्तकृत्, अवृष्यम्** ( चसू. २७.२९८ ) **कफवातघ्नं, जन्तुहृद्रोगनाशनम्** ( ध. २.८८ ) **कुष्ठहरप्रदेहे उपयुज्यते** ( चसू. ३.१२ ) **तत्र आर्द्रमरिचगुणाः-कटु स्वादुपाकि उष्णं, गुरुश्लेष्म-प्रसेकि शुष्कगुणाः-लघु अवृष्यं कफवातजिच्च** ( सुसू. ४६.२२४ ) **तत्र शुक्ल-मरिचगुणाः-रसे पाके च कटुकं, नात्युष्णं, नातिरूक्षं, तीक्ष्णं, दीपनं, रोचनं, पित्तकोपकरं, अवृष्यं, रसायनं, विषघ्नं, दृष्टिरोगघ्नं, भूतनाशनम्** ( रा. ६.१३९; चचि. २३.१९३-१९४; सुसू. ४६.२२५ ) **पिष्टका-ख्यनेत्ररोगेऽञ्जनार्थमुपयुज्यते** ( सुक. ड. ११.१३ ) **तत्फलं-शिरोरेचनार्थ-मुपयुज्यते** ( सुसू. ३९.६ )
हिं.—मिरच.
**म.—मिरी, मिरे पांढरे.**
गु.—मरी.
बं.—मरिच.
ता.—मिलगु.
फा.—पिलपिले.
मिरी.
महाकषाय वर्गातील दीपनीय—कृमिघ्न—शिरोविरेचन व शूलप्रशमन—गणातील एक द्रव्य. **गुण**—तिखट, कडू, उष्ण, कमी उष्ण, लघु, दीपनीय, रुचिकर, पित्तकारक पुष्टि कर्मी करणारे, कफवातनाशक, कृमिहृद्रोगनाशक. कुष्ठनाशक लेपात उपयोग करावा. काळी मिरी व पांढरी मिरी अशी दोन प्रकारची मिरी औषधोपचारात वापरतात.
**ओली मिरी**—तिखट, पचल्यानंतर गोड, उष्ण, जड, कफस्रावक. **सुकलेली मिरी**—हलकी, शुक्राला नाशक, कफवातनाशक. **पांढरी मिरी**—तिखट, पचल्यावरही तिखट, थोडी उष्ण, थोडी रुक्ष, तीक्ष्ण, दीपन, रोचक, पित्तकोपकर, विषघ्न, दृष्टि-रोगघ्न, भूतबाधानाशक, धातुघटक चांगल्या दर्जाचे उत्पन्न करणारे, डोळ्यात अंजन व डोक्याचे रेचक म्हणून उपयुक्त.

**-षोडशावर्ति**-स्त्री., **नेत्रवर्ति० पथ्यातुत्थकयष्टी-मरिचादिनिर्मितेयं सर्वनेत्ररोगघ्नी** (सुउ. १८.१०५) या नावाची नेत्रवर्ति. हिरडा, मोरचूद, मिरी, इत्यादी युक्त. सर्वनेत्ररोगनाशक.

**मरिचोपदंश**-वि., **मरिचावचूर्णितं व्यञ्जनम्** ( सुउ. ४०.१४९ ) मिरी घातलेले तोंडी लावणे.

**मरीच**-पु., **वनस्पति० जम्बीरः** ( रा. १०.८१ ) काळा मरवा. शेवग्याचे बी.

**( मरीची )**-स्त्री., **वनस्पति० मरुबकभेदः श्वेतमरुबकः द्र० ' मरुबक '** ( र. ३०.४७-४९ ) पांढरा मरवा.
**अर्कमूलम्** ( र. ३०.४७-४९ ) रुईचे मूळ.

**मरीचि**-पु., **महर्षि०** ( चसू. १२.११ ) या नांवाचे ऋषि.
**मान० षड्ध्वंश्यो मरीचिः** ( चक. १२.८७ ) जाळीतून येणाऱ्या उन्हाच्या कवडश्यात दिसणारे परमाणु म्हणजे १ मरीचि.
**मेघज्योतिः** ( चइ. ४.१२ ) मेघज्योती.
**मृगतृष्णा** ( ड. सुउ. ७.८ ) मृगजळ.

**मरु**-पु., **वनस्पति० जम्बीरः** ( ध. ४.५२ ) जंबीर, मरवा.

**-ज**-पु., **वनस्पति० भृष्टयवः** ( चक्र. चक. ९.७; इन्दु. असंउ. २ ) भाजलेला जव.
**खदिरभेदः विट्खदिरः द्र० ' खदिर '** (रा. ८.३८) शेण्या खैर.

**(-जा)**-स्त्री., **वनस्पति० मृगाक्षी** ( रा. ७.२५८ ) लहान चिभडे.

**-देश**-पु., **देशसंज्ञा०** ( ड. सुसू. ४५.२३ ) मारवाड देश.

**-देश्य**-पु., निर्यास० गुग्गुलुः ( रा. १२.१८४ )
गुग्गुळ.

**-बक**-पु., वनस्पति० तद्गुणाः-कटुतिक्तोष्णो रुच्यो मुखसुगन्धकृत्कफघ्नः कृमिकुष्ठविड्बन्धाध्मानशूल-मान्द्यत्वग्दोषनाशनः (ध. ४.५२-५३; रा.१०.८३)
हिं.—गोला तुलसी.
म.—**मरुबक.**
बं.—गन्धतुलसी.
काळा मरवा. **गुण**—तिखट, कडु, उष्ण, रुचकर, तोंडाला सुगंध आणणारा, कफघ्न, कृमि, कुष्ठ, मळ बांधणारा, पोटफुगी, शूल, अग्निमांद्य, त्वग्दोष-नाशक.
**फणिज्जकः** ( ध. ४.५२ ) पांढरा मरवा.

**-भू**-स्त्री., मरुदेशः, आरोग्यदेशानां श्रेष्ठोऽयम् ( चसू. २५.४० )
झाडी नसलेला देश. मरुदेशाची जागा अतिशय आरोग्यदायक.

**-भूमि**-स्त्री., देशसंज्ञा० मरुदेशः ( असंसू. १३.३ )
झाडी नसलेला देश.

**-वक**-पु., वनस्पति० मरुबकः ( चक. १.२३ )
द्र० ' मरुबक '

**-संभव**-न., वनस्पति० चाणाख्यमूलम् (ध. ४.३५)
फार मोठा मुळा.

**(-संभवा)**-स्त्री., वनस्पति० धन्वयासः (रा.३.२२)
धमासा.

**-स्था**-स्त्री., वनस्पति० धन्वयास (रा.३.२२)
धमासा.

**मरुत्**-पु., वातः (सुनि. १.१२) वायु, वारा.

**( मरुच् )-छम**-पु., वातोपशमः ( अहसू. २०.३० )
वातशामक.

**( मरुद् )-भव** पु., वनस्पति० धन्वयासः ( ध. १.२२ )
धमासा.
पद्मकः ( ध., ३.८८ ) पद्मकाष्ठ.

**-(भवा)**-स्त्री., वनस्पति० कार्पासी (रापरि. ४.४६)
कापशी.

**मरुत्तक**-पु., वनस्पति० जम्बीरः (ध. ४.५२ )
ईडलिंबू, गेळफळ.

**मरुव**-पु., वनस्पति० जम्बीरः ( रा. १०.८० ) जम्बीर.

**मर्कट**-पु., वृक्षचरप्राणि०तन्मांसगुणाः-कषायं सन्तर्पणं, वृष्यं, बल्यं, बद्धविण्मूत्रकरं, कफकरं, कफवातघ्नं, श्वासामवातमेदःपाण्डुकृमिनाशनम् (ध. ४४३-४४)
वृक्षसंचारी प्राणी. माकड. त्याच्या मांसाचे गुण—तुरट, तुष्टिकर, पौष्टिक, शक्तिवर्धक, मलमूत्रावरोधक, कफवर्धक, कफवातनाशक. श्वास, आमवात, मेद पांडु कृमि नाशक.

**(मर्कटी)**-स्त्री., वनस्पति० कपिकच्छुः (ड. सुक. २९.७; ध. १.१५१ ) खाजकुहिली.
अपामार्गः ( ध. १.२६१ ) आघाडा.
अजमोदा ( रा. ६.१५० ) ओवा.
शूकशिम्बी ( चचि. ९.४५ )
खाजकुहिली. कुसळे असलेली शेंग.

**-तिन्दुक**-पु., तिन्दुकः ( ध. ५.४१ ) टेंभुरणी.

**मर्कटक**-पु., कन्दविष० ( असंउ. ४० ) द्र० 'कन्दविष'
एक विषारी कंद.

**मर्जिका**-मज्जिका-स्त्री., कृतान्न० शिखरिणी रसाला (ध. ६.३०१; ध. ६.३०१ (२५५)) श्रीखंड.

**मर्दक**-वि., पीडाकरः ( सुचि. ४२.१३५) पीडा देणारा.
पु., वनस्पति० चक्रमर्दः ( चचि. १४.९ )
तरवटा. टाकळ्याचा प्रकार.
घर्षकः ( र. ९.८६-८७ )
घर्षणी, घासणी, घोटण्याचा बत्ता.
द्रुतद्रव्यपेषणोपयोगी लोहदण्डः ( र. ७.५९ )
पातळ द्रव्य ढवळण्यास उपयोगी. कलथा, लोखंडी दांडा.

**मर्दन**-न., खल्वे पेषणम् ( र. ८.६३ )
खलात घोटणे, मर्दन करणे.
पारदसंस्कार० द्रवद्रुतस्य द्रव्यस्य खल्वे शोषणं यावद्घर्षणम् ( र. २.२०-२१ ) द्र० ' पारद '
पाऱ्याचा बाह्यमलविनाशक असा संस्कार. पातळ द्रव्यात घातलेल्या द्रव्याचा ते सुकेपर्यंत खल करणे.
उपक्रम० अङ्गमर्दनम् ( अहसू. १३.१ )
चिकित्सेचा एक प्रकार. अंग चेपणे, अंग रगडणे.

**मर्दनक**-न., तैलम् ( ध. ६.१२५ ) तेल.

**मर्मन्**-न., शारीरस्थान० ( चसू. ११.४८ ) मारयतीति मर्म (ड. सुशा. ६.१) मरणकारित्वान्मर्म, मरण-सदृशदुःखदायित्वाद्वा ( अरु. अहशा. ४.६८ ) मर्माणि नाम मांससिरास्नाय्वस्थिसन्धिसंनिपाताः; तेषु स्वभावत एव विशेषेण प्राणास्तिष्ठन्ति । तस्मा-

न्समर्मस्वभिहतास्तांस्तान्भावानापद्यन्ते ( सुशा. ६.१५ ) तत्संख्या – सप्तोत्तरशतम्, तेषामेकादशैकस्मिन् सक्थ्नि भवन्ति। उदरोरसो-र्द्वादश चतुर्दश पृष्ठे, ग्रीवां प्रत्यूर्ध्वं सप्तत्रिंशत् ( सुशा. ६.५ ) आश्रयानुसारेण मर्मणां प्रकाराः संख्या च, मांसमर्माण्येकादश, सिरामर्माण्येकचत्वारिंशत्, स्नायुमर्माणि सप्तविंशतिः, अस्थिमर्माण्यष्टौ, सन्धिमर्माणि विंशतिः, तत्र सक्थिमर्माणि क्षिप्रतलहृदयकूर्चकूर्चशिरोगुल्फेन्द्रबस्तिजान्वाण्युर्विलोहिताक्षाणि विटपं चेति, एतेनेतरसक्थि व्याख्यातम्। उदरोरसोस्तु गुदबस्तिनाभिहृदयस्तनमूलस्तनरोहितापलापान्यपस्तम्भौ चेति।

पृष्ठमर्माणि तु कटीकतरुणकुकुन्दरनितम्बपार्श्वसन्धिबृहत्यंसफलकान्यंसौ चेति। बाहुमर्माणि तु क्षिप्रतलहृदयकूर्चकूर्चशिरोमणिबन्धेन्द्रबस्तिकूर्पराण्यूर्विलोहिताक्षाणि कक्षधरं चेति; एतेनेतरो बाहुर्व्याख्यातः। जत्रुण ऊर्ध्वं चतस्रो धमन्योऽष्टौ मातृका द्वे कृकाटिके द्वे विधुरे द्वे फणे द्वावपाङ्गौ द्वावावर्तौ द्वावुत्क्षेपौ द्वौ शङ्खावेका स्थपनी पञ्च सीमन्ताश्चत्वारि शृङ्गाटकान्येकोऽधिपतिरिति; तत्र तलहृदयेन्द्रबस्तिगुदस्तनरोहितानि मांसमर्माणि, नीलधमनीमातृकाशृङ्गाटकापाङ्गस्थपनीफणस्तनमूलापलापापस्तम्भहृदयनाभिपार्श्वसन्धिबृहतीलोहिताक्षोर्व्यः सिरामर्माणि, आणीविटपकक्षधरकूर्चकूर्चशिरोबस्तिक्षिप्रांसविधुरोत्क्षेपाः स्नायुमर्माणि, कटीकतरुणे नितम्बांसफलकशङ्खास्त्वस्थिमर्माणि, जानुकूर्परसीमन्ताधिपतिगुल्फमणिबन्धकुकुन्दरावर्तकृकाटिकाश्चेति सन्धिमर्माणि; परिणामानुसारेण मर्मणां प्रकाराः–सद्यःप्राणहराण्येकोनविंशतिः, कालान्तरप्राणहराणि त्रयस्त्रिंशत्, विशल्यघ्नानि त्रीणि, वैकल्यकराणि चतुश्चत्वारिंशत्, रुजाकराण्यष्टौ; तत्र सद्यःप्राणहराणि सप्तरात्राभ्यन्तरान्तरान्मारयन्ति, कालान्तरप्राणहराणि पक्षान्मासाद्वा, तेष्वपि क्षिप्राणि कदाचिदाशु मारयन्ति, विशल्यप्राणहराणि च कदाचिदत्यभिहतानि मारयन्ति। तत्र सद्यःप्राणहरमन्ते विद्धं कालान्तरेण मारयति, कालान्तरप्राणहरमन्ते विद्धं वैकल्यमापादयति, विशल्यप्राणहरं च; वैकल्यकरं कालान्तरेण क्लेशयति, रुजां च करोति, रुजाकरमतीव्रवेदनं भवति ( सुशा. ६.३-८, २३,२२ ) तत्र सद्यःप्राणहराण्याग्नेयानि, अग्निगुणेष्वाशु क्षीणेषु क्षपयन्ति। कालान्तरप्राणहराणि सौम्याग्नेयानि, अग्निगुणेष्वाशु क्षीणेषु क्रमेण च सोमगुणेषु कालान्तरेण क्षपयन्ति; विशल्यप्राणहराणि वायव्यानि, शल्यमुखावरुद्धो यावदन्तर्वायुस्तिष्ठति तावज्जीवति, उद्धृतमात्रे तु शल्ये मर्मस्थानाश्रितो वायुर्निष्क्रामति, तस्मात्सशल्यो जीवत्युद्धृतशल्यो म्रियते, पाकात्पतितशल्यो वा जीवति; वैकल्यकराणि सौम्यानि, सोमो हि स्थिरत्वाच्छैत्याच्च प्राणावलम्बनं करोति; रुजाकराण्यग्निवायुगुणभूयिष्ठानि, विशेषतश्च तौ रुजाकरौ; पाञ्चभौतिकीं च रुजामाहुरेके ( सुशा. ६.१६ ) तेषां प्रधानमर्माणि–हृद्बस्तिशिरांसि, तन्मूलत्वाच्छरीरस्य (चसि. ९.३) मर्मविद्धलक्षणानि–देहप्रसुप्तिर्गुरुता संमोहः शीतकामिता स्वेदो मूर्च्छा वमिः श्वासः ( असंशा. ७.२७ ) शस्त्रक्रियाकाले मर्मस्थानं परिवर्जनीयम् ( सुशा. ६.३० ) ये रोगा मर्मस्थाने भवन्ति, ते प्रायेण कृच्छ्रतमा भवन्ति ( सुशा. ६.४३ )

मर्म. ज्या ठिकाणी आघात झाला असता मरण येते ते मर्म. शरिरातील मांस–सिरा–स्नायु–अस्थि–संधि हे एकत्रित आहेत तो भाग. त्यांच्यामध्ये प्राण–जीवनशक्ति निसर्गतःच अधिष्ठित असते अशा भागास मर्म म्हणावे. निरनिराळ्या मर्मावर आघात झाल्याने निरनिराळे परिणाम होतात. एकूण १०७ मर्मे सर्व शरीरभर आहेत. एका हातापायात ११, या हिशेबाने सर्व मिळून ४४, पोट आणि छाती या भागात १२, पाठीत १४, मानेच्या वरील भागात ३७ याप्रमाणे त्यांची अवयवात विभागणी आहे. आश्रयानुसार त्यांचे प्रकार व संख्या आहेत. मर्मांचे प्रकार—मांसमर्मे ( ११ ) सिरामर्मे ( ४१ ) स्नायुमर्मे ( २७ ) अस्थिमर्मे (१८) संधिमर्मे (२०) [ यांची नावे मुळात आहेत. ] शरिरावर घडणाऱ्या परिणामानुसार मर्मांचे प्रकार आणि संख्या—

सद्यःप्राणहर ( तावडतोब प्राण नाशक )—१९
काही दिवसांनी प्राण घालविणारी—३३
शल्य काढतांच मारक होणारी—३
वैकल्य करणारी—४४
रुजा करणारी—८

यातील **सद्यःप्राणहर**—मर्मावर आघात झाला

तर ७ दिवस, **कालांतर प्राणहर**—मर्मावर आघात झाला तर १५ दिवस किंवा १ महिन्यात मरण येते. पण यातील **क्षिप्र**—नावाचे मर्म त्वरित प्राणघातक आहे. —मर्म जर अति ठेचले गेले तर तात्काल प्राणहारक होते. सद्यःप्राणहर मर्मावर मर्मस्थानाच्या कडेच्या भागात जर आघात झाला तर ते कालांतराने प्राणघातक होते. कालांतर प्राणहर, आणि विशल्य प्राणहर मर्माच्या कडेवर आघात झाल्यास अवयवात विकृति होते. वैकल्यकर मर्माच्या कडेवर आघात झाला झाला तर वेदना व क्लेश होतात. रुजाकर मर्माच्या कडेवर आघात झाला तर सौम्य पीडा होते.

मर्मामध्ये ताबडतोब प्राणहारक मर्मे आग्नेय असतात. ते आग्नेय गुण आघातामुळे तात्काल नष्ट होऊन प्राणमोक्ष होतो.

कालांतर प्राणहर मर्मे सौम्य आणि आग्नेय अशा दोन्ही गुणांची असतात. त्यांतील आग्नेय गुणांची मर्मे गुणांचा तात्काल नाश होऊन त्वरित व सौम्य गुण सावकाश नष्ट होत असल्यामुळे कालांतराने प्राणनाश करतात.

विशल्यप्राणहर मर्म वायव्य गुण भूयिष्ठ आहेत. त्यात शल्य असले म्हणजे आत वायु अवरुद्ध असेपर्यंत रोगी जगतो. शल्य काढताच मर्माश्रित वायु बाहेर निघून प्राणनाश करतो. जर शल्याचा भाग पिकून ते पडून गेले तर तो रोगी जगतो.

वैकल्यकर मर्मे सौम्य असतात. सोम हा स्थिर व शांत असल्याने प्राणधारण करतो.

रुजाकर मर्मे अग्नि वायु गुणभूयिष्ठ असतात. म्हणून ती आघातानंतर अधिक पीडा करतात. पीडा ही पांचभौतिक आहे असे काहींचे मत आहे.

**मुख्य मर्मे**—हृदय, बस्ति, आणि शिर हे शरिरातील मूळ महत्वाचे अवयव असल्याने ती प्रधान मर्मे होत.

**मर्म विध्द झाल्याची लक्षणे**—विद्ध झालेला भाग बधिर जड होणे, विचारशक्ति नष्ट होणे, थंड पदार्थाची इच्छा, घाम, बेशुद्धि, ओकारी, श्वास.

शस्त्रक्रिया करताना मर्मस्थान वर्ज्य करावे. मर्मस्थानी होणारे रोग बहुधा कष्टसाध्य असतात.

**हृदयम्** ( चक्र. चचि २१.२६ ) हृदय.

**( मर्म )–ग**–वि., **मर्मणि गतः** ( अहसू. १.३० )
मर्मात गेलेला,

**–घट्टन**–न., लक्षण० **हृदयमंथनम्** ( असंनि. ४.२५ )
हृदयात घुसळल्यासारखी पीडा.

**–च्छिद्**–वि., **प्राणायतनहृदयमर्मच्छिद्** ( मधुकोशः सुनि. १६.५४ )
प्राणाधार अशा हृदयाचा छेद करणारे.

**–च्छेद्**–पु., लक्षण० **मर्मविद्धवत्पीडा** ( चचि. ३.८१; सुउ. ३९.८८; सुचि. २६.१२ )
मर्मावर आघात केल्याप्रमाणे पीडा.

**–च्छेदन**–न., **मर्मच्छेदः** ( असंनि. २.८६ )
मर्मांचा छेद.

**–जात**–वि., **मर्मण्युत्पन्नः** ( सुचि. १८.१४ )
मर्मात तयार झालेले.

**–त्रय**–वि., **त्रीणि प्रधानमर्माणि, शिरो हृदयं बस्तिश्च** ( चसू. २९.३ )
तीन प्रमुख मर्मे. शिर, हृदय, आणि बस्ति.

**–संरोध**–पु., **मर्मणां रोधः** ( चसू. १७.१११ )
मर्मस्थानाचा अवरोध.

**–सदन**–न., **मर्मस्थानम्** ( सुशा. ६.३० )
मर्मस्थान.

**–हत**–पु., **मर्मसु हृदयादिषु हतः** ( सुचि. २.७८ )
मर्मावर झालेला आघात.

**मर्मरिका**–स्त्री., **कर्णस्थसिरा० तद्वधोपद्रवाः—वेदना ज्वरो ग्रन्थयश्च** ( सुसू. १६.५ )
कानातील शीर. ती कापली गेली तर उपद्रव वेदना ज्वर व गांठी.

**मर्मरी**–स्त्री., **कर्णगतसिरा०** ( असंउ. १ )
कानातील शीर.

**मर्माभिघात**–पु., **मर्माघातः** ( असंशा. ७.३६ )
मर्मावर आघात.

**मर्माश्रय–मर्मस्थानम्** (असंशा. ७.३६) मर्माचे ठिकाण.

**मर्मोपघात**–पु., **मर्माघातः** ( चचि. १२.६ ) **द्र० 'मर्म'**
मर्मावर आघात.

**मर्मोपहासिन्**–वि., **मर्म-व्यङ्गं, न्यूनं, तदुपहासकः** ( चसू. ७.५६ )
एखाद्याचे व्यंग पाहून, न्यून किंवा कमीपणा पाहून कुत्सितपणे हासणारा.

**मर्यल**–पु., **ऋषि० प्राचीनो रसाचार्यः** ( र. १९.७-९ )
या नांवाचे रसशास्त्री ऋषि.

**मर्यादा**–स्त्री., **सीमा** ( सुशा. ४.५ )
सीमा, मर्यादा.

**-विभक्त**-वि., **समसीमाव्यवस्थापितः** ( चइ. १.९ )
योग्य तऱ्हेने भाग केलेला. योग्य मर्यादा आंखलेला.

**मर्श**-पु., **नस्यभेदः** ( अहसू. २०.९-२१ ) द्र० 'नस्य'
नस्याचा प्रकार.

**मल**-पु., **त्याज्यांशः, किट्टस्वरूपः, शरीरस्याऽबाधकरः, तद्यथा-शरीरच्छिद्रेषूपदेहाः पृथग्जन्मानो बहिर्मुखाः परिपक्वाश्च धातवः, प्रकुपिताश्च वातपित्तश्लेष्माणो ये चान्येऽपि केचिच्छरीरे तिष्ठन्तो भावाः शरीरस्योपघातायोपपद्यन्ते, सर्वांस्तान्मले सञ्ज्ञक्ष्महे** ( चशा. ६.१७ ) द्र० 'किट्ट'
मल. शरिरातील टाकाऊ पदार्थ. मल, मूत्र, घाम, वगैरे. शरिराच्या छिद्रातील निरनिराळे बाहेर जाणारे मळ. शरिरातील कार्य संपल्यानंतर जीर्ण झालेले किंवा पू झालेले किंवा शीर्यमाण ( झरलेले ) धातु, प्रकुपित वातपित्तकफ व शरिरात असून शरिराला बाधक होऊ शकतात असे शरिरातील भाव त्या सर्वांना मल म्हणतात.
**पुरीषम्** ( सुनि. ७.१७ ) विष्ठा.
**वातादिदोषः** ( चसू. २८.३१ ) वातादिदोष.
**खनिज० लोहमलः शिलाजत्वादिः** ( चसू. १.७० )
लोहादिकांचे मल. शिलाजित, मण्डूर वगैरे.
न., **भैषज्य० समुद्रफेनम्** ( सुउ. ११.८; ध. ३.१५४ )
समुद्रफेस.

**-करी**-स्त्री., **कफपित्तादिदोषवर्धकः कञ्चुकाख्यः पारददोषः** ( र. ११.२२ )
पारदातील एका जातीचा कंचुका नावाचा दोष. हा कफपित्तादिवर्धक असतो.

**-क्षय**-पु., (परिव०) **लक्षण० मलस्य क्षीणत्वम्, स देहपीडनो भवति** ( अहसू. ११.२५ )
मलांचा क्षय, तो देहाला त्रासदायक होतो.

**-ग्रह**-पु., **लक्षण० मलावरोधः** ( अहसू. १०.२२ )
मलावरोध.

**-घ्न**-पु., **वनस्पति० शाल्मलीकन्दः** (रापरि. ७.४६)
सावरीकंद.

**-ज**-वि., **मलाज्जात इति** ( चवि. ७.९ ) मलापासून झालेले.

-(**जा**)-स्त्री., **ग्रह० पूतनाग्रहः** (का. चि.) पूतनाग्रह.

**-जित्**-वि., **मलहरः** ( अहसू. ३.५२ ) मलनाशक.

**-द्राविन्**-पु., **वनस्पति० जयपालः, दन्तीबीजं** ( ध. १.२२७ ) जयपाळ.



**-धरा**-स्त्री., **शारीर० पुरीषधरा कला** (सुशा. ४.१७)
विष्ठाधरा कला. मलधरा कला, मलमूत्रादिक मलांचे विभजन करणारी कला.

**-नाशिनी**-स्त्री., **वनस्पति० जातिपत्री** (ध. ३.३३)
जायपत्री.

**-निग्रह**-पु., **लक्षण० मलावरोधः** ( र. २१.१३०-३३ ) मलावरोध.

**-पाचन**-वि., **दोषपाचनम्** ( असंचि. १.२२-२३ )
दोष पचन करणारे.

**-पू**-स्त्री., **वनस्पति० काकोदुम्बरिका** ( चचि. १.६२; सुचि. ८.५० )
काळा उंबर, खर्वती.
**काष्ठोदुम्बरिका** ( ड. सुचि. ९.१५ )
काळा, उंबर, खर्वती.

**-बन्ध**-पु., **लक्षण० मलावरोधः** ( ३.१०२ )
मलावरोध, मळ बांधीव-घट्ट होणे.

**-बन्धन**-न., (परिव०) **मलावरोधः** ( र. २.५-६ )
मलावरोध, मळ बांधणे, घट्ट होणे.

**-भूत**-वि., **मलस्वरूपः** ( चशा. ६.१७ )
मलरूप, मळस्वरूपी.

**-शुद्धि**-स्त्री., **पुरीषोत्सर्जनम्** ( र. २०.११५-१७ )
शौचशुद्धि, मलविसर्जन.

**-संकर**-पु., **मलमिश्रणम्** ( अहसू. ५.४४ )
घाण मिश्र होणे.

**-संक्षय**-पु. **मलस्य क्षयः** (चसू.७.४३) मळाचा क्षय.
**मलस्य स्वमानादपि क्षयः** ( चसू. ७.४३ )
मळाचा स्वतःच्या स्वाभाविक प्रमाणापेक्षा प्रमाण कमी होणे.

**-सङ्ग**-पु., **लक्षण० मलावरोधः** ( अहसू. १३.२४ )
मलावरोध, मळाचा संचय.

**-हन्तृ**-पु., **वनस्पति० शाल्मलीकन्दः** ( रापरि. ७.४६ ) सावरीचा कंद.

**मलय**-पु., **देश० नन्दनवनम्** ( सुसू. ६.२५-२९ )
मलय नावाचा देश. नंदनवन.
**पर्वत० अत्र 'चन्द्रमा' इति सोमविशेष उपलभ्यते हिमवत्यर्बुदे सह्ये महेन्द्रे मलयेऽपि तथैव** ( सुचि. २९.२७ )
पर्वताचे नाव. यावर चंद्रमा सोम विशेष आढळतो.
**वनस्पति० पद्मकः** ( ध. ३.८८ ) पद्मकाष्ठ.

( **मलया** )-स्त्री., **वनस्पति० बाकुची** ( र. २०.२०५ )
बावची.

–ज–न., वनस्पति० चन्दनम् (ध.३.१; सुउ.४७.५५) श्वेतचन्दनम् ( र. १८.२११ ) चंदन, पांढरे चंदन.

–वासिन्–वि. ,मलयदेशस्थितः जनः ( चचि. ३०.३१ ) मलय देशात राहाणारे लोक.

**मलयज**–न., वनस्पति० चन्दनम् (रा. १२.३) चन्दन.

**मलयू**–स्त्री., वनस्पति० काकोदुम्बरिका ( ध. ५.८८; असंचि. २२ )
एक प्रकारचा उंबर, काळा उंबर, खर्वती.

**मलयोत्थ**–न., वनस्पति० कालीयकम् ( ध. ३.८ )
एक प्रकारचा चंदन.

**मलयोद्भव**–न., वनस्पति० चन्दनम् ( रा. १२.१ )
चंदन.

**मलयोद्भूता**–वि., मलयपर्वतोद्भवा ( अहसू. ५.१० )
मलयपर्वतावर उत्पन्न झालेली.

**मलाक्तता**–स्त्री., लक्षण० पङ्कमलोपदिग्धता ( अरु. अहसू. ७.११ )
घाणीने युक्त असणे, घाणीने (चिखलाने) माखलेला, भरलेला असणे.

**मलाधार**–पु., शारीर० मलस्याधारः, आशयः, स्थानम् ( सुनि. ३.२० )
मलाशय. पुरीषाचा–विष्ठेचा–आशय आधार.

**मलाधिक्य**–न., लक्षण० विंशतिश्लेष्मविकारेष्वेको विकारः, मलवृद्धिः ( चसू. २०.१७)
मलाधिक्य. मलाची वाढ. वीस कफविकारापैकी एक.

**मलानुलोमनी**–वि., वातादीन् स्वमार्गस्थान् कुर्वाणा ( अहसू. ६.२९ )
मलवायूला स्वमार्गाकडे नेणारी, वातादी मलांचे अनुलोमन करणारी.

**मलापहा**–स्त्री., वनस्पति० कुलत्था ( ध. ३.१५६ )
मलनाशक, कुळीथ.

**मलायतन**–न., मलस्थानम् ( सुसू. २४.९ )
मलाचे स्थान.

**मलायन**–न., शारीर० मलस्थानं मलमार्गो वा ( चसू. ७.४२; अहसू. २.३१ )
मलमार्ग, मलस्थान.

**मलारि**–पु., लवण० सर्वक्षारः ( रा. ६.५७ ) सर्व क्षार.

**मलिन**– वि., समलम् ( सुउ. ५४.३ )
कलुषम् (अरु.) नीलम् ( हे अहसू. २७.४१ )
मळकट, मळासह घाणेरडे निळे ( रक्त )
खनिज. टङ्कण. रा. ६.२९ ) टाकणखार.

( **मलिना** )–स्त्री., वनस्पति० कण्टकारीभेदः द्र० 'कण्टकारी' ( ध. १.९९ ) काटेरिंगणी.

**मलिनाङ्गी**–स्त्री.,वनस्पति०कण्टकारीभेदः,द्र०'कण्टकारी' ( ध. १.९९ ) काटेरिंगणी.

**मलिनाहार**–पु., पूतिद्विष्टामेध्यपर्युषित आहारः ( सुउ. ६१.४ )
विटलेले, न आवडणारे, घाणेरडे व शिळेपाके अन्न.

**मलीमस**–न., खनिज० पुष्पकासीसम् ( ध. ३.१२५ )
.हिराकस पुष्पकासीस नावाचा प्रकार.
वि., मलिनम् घाणेरडे.

**मलोचितत्व**–न., मलस्य सहजसात्म्यता अभ्यस्तमलत्वम् ( अहसू. ११.२५ )
मलाच्या सांनिध्याची सवय असणे.

**मलोत्पत्ति**–स्त्री., मलप्रादुर्भावः ( सुनि. ६.५ )
मलाची निर्मिती.

**मलोत्सर्ग**–पु., पुरीषमलस्य विसर्जनम् ( र. २८.८० )
मलाचे–शौचाचे विसर्जन.

**मलोद्भव**–न., खनिज० लोहकिट्टं मण्डूरम् (ध. ६.३५)
मंडूर.

**मलोपघात**–पु., मलस्योपघातो नाम नाशः(चवि.७.१०)
मलाचा नाश.

**मल्य**–न., नेत्ररोग० मलदिग्धाक्षिता ( चचि. १७.१२८ )
मळ अधिक असणारा नेत्ररोग.

**मल्ल**–पु., शरावः ( र. ९.६८ ) परळ.
पर्णम् ( र. २५.९८ ) पान.

( **मल्ली** )–स्त्री., वनस्पति० मल्लिका ( रा. १०.२२५ )
मोगरी.

–मूषा–स्त्री., मूषा० शरावमूषा ( र. १७.९४,९८ )
मूस–परळांची मूस.

**मल्लक**–पु., जलचरपक्षि० मलिनचञ्चुचरणहंसभेदः ( असंसू. ७.८१-८३ )
हंसाचा प्रकार. मलिन चोच व पाय असलेला.
मत्स्य० ( का. धात्रीचि. ) एक मासा.

–संपुट–पु., संपुट० शरावमुखयोः संपुटीकृतपात्रम् ( चचि. २६.१३६ ) पातव्यधूमनिर्गमार्थमूर्ध्वच्छिद्रसंपुटः ( चचि. १७.७९ )
संपुट. धूर जाण्यास वर छिद्र ठेवून परळाची तोंडे एकत्र करून केलेले संपुट.

**मल्लारिष्टा**–स्त्री., वनस्पति० पाची ( रापरि. १०.४६ )
पाच,

**मलिक**–पु., जलचारिपक्षि० **मलिनचञ्चुचरणहंसभेदः** ( असंसू. ७.८१-८३ )

जलचर प्राणी. हंसप्रकार. मळकट चोच व पाय असलेला.

**( मल्लिका )**–स्त्री., वनस्पति० **तद्गुणाः–कटुस्तिक्तोष्णा, चक्षुष्या, पित्तवातघ्नी, मुखरोगनेत्ररुजामुखपाक-कुष्ठविस्फोटकण्डूतिविषव्रणनाशिनी, च** ( ध. ५.१३४ ) मोगरा.

**गुण**—तिखट, कडू, उष्ण, डोळ्यांस हितकर, वात-पित्तघ्न, मुखरोग, तोंड येणे, डोळ्याच्या वेदना, कुष्ठ, फोड, खाज, विष व व्रण नाशक.

**वृत्तमल्लिका** ( रा. परि. १०.२३ ) बटमोगरा.

**मङ्गल्या** ( रा. १२.४५ ) अगरूचा एक प्रकार.

**मेथिका** ( ध. ६.१११ ) मेथी.

**–पुष्प** पु., **वनस्पति० कुटज०** ( ध. २.१३ ) कुडा. न., शाक० **तद्गुणाः–तिक्तं, पित्तनाशनं सौरभ्यात्** ( सुसू. ४६.२८६ )

एक प्रकारची भाजी. **गुण**—कडू, सुगंधाने पित्तनाशक.

**मल्लिकाक्ष**–पु., **शुक्लशबलो हंसभेदो मलिनचञ्चुचरण-हंसभेदः** ( ड. सुसू. ४६.१०५ )

हंसाचा प्रकार. पांढरे ठिपके असलेला, मळकट चोच व पाय असलेला.

**मशक**–पु., क्षुद्रकीट० ( चचि. २३.१५७ ) डास. **मक्षिका०** ( सुसू. १८.२९ ) **तद्दष्टलक्षणम्–कण्डू-मान् मन्दवेदनः, शोथः** ( मा विषरोग० ५४ )

डास, चिलटे–चावल्याने खाज, थोडी वेदना व सूज.

**सविषकीट० स च पञ्चविधः–सामुद्रः परिमण्डलो हस्तिमशकः, कृष्णः, पार्वतीयः, तै र्दष्टस्य तीव्रां कण्डूर्दंशशोफश्च, पार्वतीयस्तु कीटैः प्राणहरैस्तुल्य-लक्षणः, तेन नखावकृष्टेऽत्यर्थं पिडका दाहपाका भवन्ति** ( सुक. ८.३६ ) **असाध्यमशकक्षत-मिति पञ्चसु मशकेषु पार्वतीयकृतमसाध्यमाहुः** ( चक्र. चचि. २३.१५७ ) **तच्चिकित्सा–गोमूत्र-युक्ता कृष्णवल्मीकमृत्तिकालेपनम्** ( सुक. ८.५५ )

समुद्राच्या परिसरातील मोठा डास. ह्या डासाच्या ५ जाती आहेत. (१) सामुद्र (२) परिमंडल (३) हस्तिमशक (४) कृष्ण आणि (५) पार्वतीय. **डोंगरातील काळा डास चावल्याचे चिन्ह**—तीव्र, खाज, सूज. **पर्वतातील डास**—चावल्याने प्राण जाईल अशी लक्षणे होतात, नखाने खरवडल्यानंतर अतीशय दाह, पू व पुळ्या होतात. दंशाने झालेले क्षत असाध्य व्हावे अशा ह्या ५ प्रकारांतील पार्वतीय डासाचा दंश अधिकच असाध्य असतो. **उपचार**—गोमूत्रातून वारुळाची काळी माती लावावी.

**क्षुद्ररोगभेदः रक्तदोषजविकारेष्वेकः तस्याऽधिष्ठानं तृतीया श्वेता नाम त्वक्** ( सुशा. ४.४ ) **तच्चिकित्सा–प्रतिसारणीयः क्षार उपयुज्यते** ( सुसू. ११.७ ) **द्र० ' मषक '**

रक्तदोषज रोगांपैकी एक. श्वेता नावाच्या तिसऱ्या पांढऱ्या त्वचेवर होतो. **उपचार**—लावण्याचा ( प्रतिसारणीय ) क्षार लावावा.

**मष**–पु., क्षुद्ररोग० **त्वक्स्थास्तिलाभाः कृष्णा अवेदना उन्नताश्च पिटिकाः** ( असंउ. ३६ )

मष–अंगावर उगवणारे त्वचेवर तिळासारख्या काळ्या व वेदना नसणाऱ्या उठावदार पुळ्या.

**( मषी )**–स्त्री., **दग्धत्वात्कृष्णतां यातं द्रव्यम्, भस्म, कज्जलम्** ( र. ५.२३३-३६ )

काजळ–मषी, मस, मशेरी; जळाल्याने काळे झालेले द्रव्य. भस्म.

**मषक**–पु., बहिर्मार्गजः क्षुद्ररोग० ( चसू. ११.४९ ) **माषवदुत्सन्नः पिटकाविशिष्टो रोगः** ( सुनि. १३.४२ ) **मषकं समुत्कृत्य क्षारेणाऽथवा वह्निना युक्त्या प्रदहेत्** ( सुचि. २०.३२-३३ ) **द्र० 'मशक'**

मस नावाचा क्षुद्ररोग. त्वचेचा विकार. उडदासारखी व त्वचेवर उंच अशी विशिष्ट प्रकारची पुळी. हिलाच मस म्हणतात. उपचार–मस उकरून काढावा व क्षाराने किंवा अग्नीने जाळावा.

**–लेख्यदल**–पु., वनस्पति० **श्रीतालः** ( रा. ९.९५ )

ताडपत्र; काजळाच्या शाईने लिहिण्याजोगे ताडाचे पान.

**मसार**–पु., रत्न० **मरकतरत्नम्** ( इन्दु. असंचि. ६ )

मरकत रत्न. पाचू.

**मसी**–स्त्री., **मस्म, रक्षा, दग्धाऽवशिष्टं कज्जलम्** ( सुउ. ५१.३८ )

भस्म, राख. जळून गेल्यावर उरलेले काजळी.

**कज्जली** ( र. १२.१२१-२२ ) काजळ, काजळी.

**कृष्णभस्म** ( र. २३.२९ ) काळे भस्म.

**मसूर**–पु., शिम्बीधान्य० ( चसू. २७.२८; अहसू. ६.१७ ) **तद्गुणाः–मधुरः, शीतो, लघुः,**

संग्राही, वातरोगकरः, कफपितघ्नो, मूत्रकृच्छ्रघ्नः (ध. ६.९५; रा. १६.१४९) स च द्विविधः— कृष्णः पाण्डुरश्च; तत्र कृष्णवर्णो मसूराभिधानाः, पाण्डुवर्णो मङ्गल्यकाऽभिधानाः (ड. सुसू. ४६.३०)
हिं.—मसूर.
**म.—मसूरा, चणई.**
गु.—मसुर.
बं.—मसूरी, मसूरिकलाय.
मसूर.
मसूर—मधुर, शीत, लघु, मल घट्ट करणारे, वातरोग करणारे, कफपित्तनाशक, मूत्रकृच्छ्रनाशक आहे. ते दोन प्रकारचे आहेत. (१) काळे (२) व पांढरे. काळसरांना मसूर व पांडुरवर्णाच्यांना मांगल्यक म्हणतात.

**( मसूरा )**—स्त्री., वनस्पति० त्रिवृच्छयामा (ध. १.२४३) काळे तेड.

**( मसूरी )**—स्त्री., वनस्पति० श्यामाभेदः त्रिवृच्छयाम (रा. ६.३६९) काळ्या तेडाचा एक प्रकार.

**—दलमात्रा**—वि., मसूरदलप्रमाणा (सुउ. ७.३) मसुराच्या डाळिंबी इतके.

**—दलमुखा**—वि., मसूरदलवन्मुखं यस्याः सा (शलाका) (असंसू. ३४.१५) मसूराच्या डाळिंबीप्रमाणे मुख असणारी सळई.

**—विदलप्रख्य**—वि., मसूरपर्णसंनिभः (असंशा. ११.४५) मसुराच्या पानाच्या रंगाचा.

**—विदला**—स्त्री., वनस्पति० श्यामलता (चक. चक. ११.१४) श्यामलता, एक वनस्पती.
**निस्तुषमसूरा** (चचि. ७.१३७)
टरफल नसलेला मसूर.

**मसूरक**—पु., शिम्बीधान्य० मसूरः (रा. १६.१४९) मसूर.

**मसूरिका**—स्त्री., रोग० (चइ. ११.१४; सुनि. १३.३८) तत्संप्राप्तिः—शोणितसंसृष्टं पित्तं यदा त्वचं दूषयति तदा सर्वगात्रेषु मसूरमुद्गमाषतुल्याः पिडकाः करोति (मधुकोश, मा. मसूरिका) तत्पूर्वरूपाणि—ज्वरः, कण्डूर्गात्रभङ्गोऽरतिर्भ्रमो वैवर्ण्यं, नेत्ररोगः शोथः; तत्पञ्चभेदाः—वातजमसूरिकालक्षणानि—श्यावारुणा रूक्षास्तीव्रवेदनयाऽन्विताः कठिनाश्चिरपाकाश्च स्फोटा भवन्ति। सन्ध्यस्थिपर्वभेदः, कासः, कम्पोऽरतिः क्लमस्ताल्वोष्ठजिह्वाशोषस्तृष्णाऽरुचिः; पित्तजलक्षणानि—रक्ताः पीतसिताः सदाहास्तीव्रवेदनयाऽन्विताः, शीघ्रपाकाश्च स्फोटा भवन्ति। अङ्गमर्दो विड्भेदो दाहस्तृष्णाऽरुचिर्मुखपाकोऽक्षिरागस्तीव्रज्वरः, रक्तजमसूरिकालक्षणानि—पित्तजवल्लक्षणानि; कफजमसूरिकालक्षणानि—श्वेता स्निग्धा भृशं स्थूलाः कण्डूरा मन्दवेदनाश्चिरपाकाः स्फोटा भवन्ति। अरुचिर्निद्राऽऽलस्यं स्तैमित्यं, शिरोरुग्गात्रगौरवं, हृल्लासः; सान्निपातिकमसूरिकालक्षणानि— चर्मदलमसूरिकालक्षणानि—नीलाश्चिपिटविस्तीर्णाः, मध्ये निम्नाः, महारुजश्चिरपाकाः पूतिस्रावाः, प्रभूताः स्फोटाः, कण्ठरोधाऽरुचिस्तम्भाऽरतिप्रलापाश्च (मा. मसूरिका.)
देवी. या विकारात प्रकुपित झालेले पित्त रक्ताच्या आश्रयाने त्वचेला दूषित करून मसुराच्या डाळीप्रमाणे सर्व शरीरभर फोड उत्पन्न करते. मसूरिका पूर्वरूप—ताप, खाज, अंग फुटल्यासारखे वाटणे, बेचैनी, भोवळ, त्वचेचा रंग बदलणे, नेत्र लाल, सूज, इत्यादी. त्याचे प्रकार. (१) वातज मसूरिका (२) पित्तज मसूरिका (३) कफज मसूरिका (४) रक्तज मसूरिका (५) सान्निपातिक मसूरिका.
(१) **वातज**—काळे, तांबूस, रुक्ष, तीव्रवेदनायुक्त, कठीण, उशीरा पिकणारे फोड इत्यादी०
(२) **पित्तज**— लाल, पिवळे, पांढरे, दाह, तीव्रवेदनायुक्त, लवकर पिकणारे फोड, ज्वर, इत्यादी०
(३) **रक्तज**—पित्तजाप्रमाणे. (४) **कफज**—पांढरे, स्निग्ध, खूप मोठे, खाजरे, मंद वेदनायुक्त, उशीरा पिकणारे फोड. (५) **त्रिदोषज**— निळे, चपटे, विस्तीर्ण, मध्ये खोलगट, अति वेदनायुक्त, उशीरा पिकणारे, पू स्रवणारे पुष्कळ फोड होतात. इतर सार्वदेहिक चिन्हे त्या त्या देवीच्या प्रकारात होतात.

**मसृण**—वि., गुण० चिक्कणः, श्लक्ष्णः (र. २.५७) मृदुः (र. ३.४९) गुळगुळीत. चिक्कण.
न., खनिज० सुवर्णगैरिकम् (ध. ३.१७०)
सोनकाव.

**मस्कर**—पु., वनस्पति० वंशः (रा. ७.२१६; ध.४.१३७) बाम्बू.

**मस्त**—न., शारीर० मस्तकम् (रा. २४.३१) डोके, मस्तक.

**मस्तक**—न., शारीर० प्रत्यङ्गेष्वेकम्, शिरः (सुसू.३५.१२) मस्तक. एक उप अवयव.
शीर्षोर्ध्वभागः (सुशा. ५.४)
डोक्याचा वरचा भाग.

**–मज्जन्**–पु., **तालादीनामग्रभागे या मज्जा भवति सा** (सुसू. ४६.३१०) द्र० **'ताल, नालिकेर, खर्जूर'** मज्जा. ताड, नारळ, खजूर इत्यादींच्या शेवटच्या टोकाला असलेली मज्जा.

**–शालिनी**–स्त्री., **यशोदायिनी** ( र. १२.१०४ ) यशस्वी. यश देणारी.

**गोलाकारा** ( १२.१०४ ) गोल आकाराची.

**मस्तिष्क**–पु., न., **शारीर० शिरोगतस्नेहः** ( चक्र. ) **शिरसि मस्तिष्कस्याऽर्धाञ्जलिः प्रमाणम्** (चशा. ७.१५) **शिरःस्थो मज्जा** (चक्र.चसि. ९.७९) **मस्तुलुङ्गस्रुतावन्यजीवजान्मस्तिष्कान्खादेत्** ( असंउ. ३१ ) मेंदू. डोक्यातील स्नेह. डोक्यात मस्तिष्क स्नेह अर्धी अंजली आहे. डोक्यातील मज्जा. डोक्यावरील आघाताने जर आतली मज्जा स्रवली तर अन्य जीवांच्या डोक्यातील मज्जा खावी.

**–स्नेह**–पु., ( परिव० ) **उपक्रम० शिरोभ्यङ्गः** ( सुचि. ३१.३ ) डोक्याला तेल लावणे ( चोळून जिरवणे ).

**मस्तिष्क्य**–न., **शिरोबस्तिप्रकारः सच स्नेहाऽक्तपिचुप्लोतादिभिः क्रियते** ( सुचि. ३.५४ ) शिरोबस्तीचा एक प्रकार. विशिष्ट विधिपूर्वक डोक्यावर तेल भरणे.

**मस्तु**–न., **दधिजलम्** ( रा. १५.२४५ ) **दध्न उपर्यच्छो भागः, 'उक्तं दधि द्विगुणवारियुतन्तु मस्तु'** ( अहृकोश० चसू. १३.६६; सुचि. ५.८ ) **तद्गुणाः– अम्लं, कषायं, मधुरं, लघु, स्रोतोविशोधनं, बल्यं, प्रह्लादनं, प्रीणनं तृष्णाक्लमहरं कफवातापहं द्राग्मलभेदनं भक्तच्छंदकृच्च** ( सुसू. ४५.८१-८२ ) दह्यावरील निवळ. पाणी. दह्याच्या दुप्पट पाणी घातले की मस्तु. **गुण**—आंबट, तुरट, गोड, हलके, स्रोतसांची शुद्धि करणारे, बळकर, आनंदकर आवडणारे धातुपरिपोषक. मळ लवकर फोडणारे, तहान–थकवा नाशक, कफवात नाशक व अन्नावर इच्छा उत्पन्न करणारे.

**–लुङ्ग**–पु., न., **शारीर० शिरसो बलाधानं स्त्यानघृताकारमस्तुलुङ्गमुच्यते** ( ड. सुचि. २.७० ) **मज्जा०** ( इन्दु. असंउ. २ ) **कपालमज्जा** ( इन्दु. असंउ. ३१ ) **अर्धविलीन–घृताकारो मस्तकमज्जा** ( सुसू. २३.१२ ) **कपालपूरणम्** ( इन्दु. असंउ. २९ ) मेंदू, मज्जायुक्त प्रमुख अंग. डोक्यातील बलाचे आधान असलेला थिजलेल्या तुपासारखा पदार्थ. कवटीतील मज्जा. अर्धवट पातळ तुपासारखा पदार्थ. कवटीचे पूरण करणारा पदार्थ.

**–लुङ्गक्षय**–पु., **रोग० मस्तुलुङ्गक्षयात्तात्वस्थिवायुर्नामयेत्तेन च रुग्णः तृड्दैन्ययुक्तो भवति, तत्र मधुरकैः शृतं घृतं पानाभ्यञ्जनयोर्योज्यम्, शीताम्बुचुलकैरासेचनात्त्रासनं कार्यम्** ( सुशा. १०.४२-४३ ) मेंदूतील मज्जेचा क्षय. याने वायु प्रकुपित होऊन तो टाळूचे हाड वाकवितो. रोगी तहानयुक्त, केविलवाणा होतो. यावर गोड द्रव्यांनी तयार केलेले तूप पिण्यास व अभ्यंगास द्यावे, थंड पाण्याच्या चुळांनी शिंपून त्रस्त करणे.

**–लुङ्गदर्शन**–न., **मस्तकमज्जादर्शनम्, भिन्ने वा शिरःकपाले यत्र मस्तुलुङ्गदर्शनं तत्र व्रणस्यासाध्यत्वम्** ( सुसू. २३.१२ ) डोक्यातील मज्जा दिसणे. डोक्याची कवटी फुटून जेथे मेंदू उघडा दिसतो तो व्रण असाध्य असतो.

**–लुङ्गस्राव**–पु., **मस्तुलुङ्गस्य बहिरागमनम्** ( सुसू. २३.१२ ) मेंदूतील मज्जेचा स्राव. मज्जा बाहेर येणे.

**–लुङ्गस्रुति**–स्त्री., **मस्तुलुङ्गस्रावः, मस्तुलुङ्गस्रुतावन्यजीवजान्मस्तिष्कान्खादेत । शल्ये हृतेऽन्यस्मादङ्गात्स्नेहवर्तिं निधापयेत्** ( असंउ. ३१ ) मेंदूचा स्राव. हा स्राव झाला असता अन्य जीवांचे मेंदु खावेत. मेंदूखेरीज इतरत्र रुतलेले शल्य काढून घेतल्यानंतर त्यात औषधि स्नेहाची वात ठेवावी.

**–लुङ्गोपम**–वि., **मस्तुलुङ्गप्रतिमम्** ( सुउ. ४०.१९ ) मेंदूच्या वर्णाचा, मेंदूसारखा.

**मस्तुक**–न., **दधिजलम् मस्तु** ( असंसू. २५.७४ ) दह्याची निवळ.

**मस्त्वारनालवसन**–न., **मस्त्वारनालस्तिमितं वसनम्** ( चक्र. चचि. २२.३७ ) कांजी, दह्याची निवळी. यामध्ये भिजविलेले वस्त्र.

**महत्**–पु., **पञ्चविंशतितत्त्वेष्वेकम्** ( सुशा. १.४ ) महत्. पंचवीस तत्त्वांपैकी एक.

न., **शारीर० हृदयम्** ( चसू. ३०.३ ) शरीरभाग, हृदय.

**( महती )**–स्त्री., वनस्पति० बृहती ( ध. १.९३ )
डोरली.
वार्ताकी ( रा. ७.१२८ )
डोरली, वांगे ( लहान ).

**( महत् )–तमस्**–न., मरणरूपं तमः ( चइ. ११.५ )
मरणरूपी अंधःकार.

**–पञ्चमूल**–न., बृहत्पञ्चमूलम् ( चसू. २६.४८; ( सुसू. ३८.६८-६९ ) द्र० 'पञ्चमूल'
मोठे पंचमूळ ( बेल, ऐरण, टेंटू, शिवण आणि पाडळ ह्या वृक्षांची मुळे मिळून बृहत् पंचमूळ होते.)

**–स्रोतस्**–न., शारीर० स्रोतो० महास्रोतः
( सुनि. १३.५५ ) महास्रोतस, सर्व पचन मार्ग.

**(महा)–जाली**–स्त्री., वनस्पति० आवर्तकी (रा.३.२९६)
चांभारआवळी.

**( महा )–कटभी**–स्त्री., वनस्पति० कटभी, श्वेता ( रापरि. ९.३८ ) मालकांगोणी.

**–कनकसुन्दर**–पु., पारदयोग० **कान्तं काञ्चनं च पारदसमभागं जारयित्वा गन्धकं च जारयेत् । ततः भस्मीकृतं तं पारदं चतुर्निष्कमितं सुवर्णं च निष्कमितं कान्तपात्रे प्रक्षिप्य पञ्चाशन्निष्कमितं गन्धकं तत्राऽन्धमूषायां बदराग्निना जारयेत् । श्लक्ष्णीकृत्य मधुपूर्णे घृतभाण्डे निक्षिपेत् । अमुनैव प्रकारेण पथ्यानां षष्टिसंयुक्तं त्रिशतं साधयेत् यत्नात् । तद्गुणाः–पाण्डुग्रहणीप्रमेहकुष्ठशूला-ऽऽमयादिनाशनः** ( र. २७.७७-८८ )
महाकनकसुंदर या नावाचे सिद्धौषध. पाऱ्यात कांत-लोह भस्म व सोन्याचे भस्म यांचे जारण करून गंधक जारण करावे. नंतर भस्म करावे. भस्म झालेला हा पारा चार तोळे व सुवर्णभस्म एक एक तोळा कांतलोहाच्या भांड्यात टाकून पन्नास तोळे शुद्ध गंधक अंधमूषेत घालून बोराच्या लाक-डाच्या अग्नीने जारण करावे. त्यातील एक तोळा चूर्ण घोटून गुळगुळीत करून तूप जिरलेल्या मधाने भरलेल्या भांड्यात ठेवावे. नंतर तीनशे साठ हिरडे जीवनीय गणाच्या काढ्यात पाण्यात शिजवून मधाने भरलेल्या त्याच भांड्यात ठेवावे. संधिलेप करून महि-नाभर ठेवावे व नंतर उपयोग करावा. गुण–पांडु, ग्रहणी, प्रमेह, कुष्ठ, शूल इत्यादी नाशक.

**–कन्द**–पु., वनस्पति० **राजपलाण्डुः** द्र० 'पलाण्डु' ( रा. ७.१०४ ) कांदा. पांढरा गोड कांदा.

लशुनभेदः ( ध. ४.६६ ) एक प्रकारचा लसूण.
मुखालुः ( रापरि. ७.२२ ) मुखाळू.
न., चाणाख्यमूलम् ( रा. ७.५३ )
फार मोठा मुळा.
मूलकम् ( ध. ४.३३ ) मुळा.

**–कपिल**–पु., मूषिक० **दष्टलक्षणम्–क्रुद्ध–रक्तजान् विकारान्कुरुते । ग्रन्थिमण्डलकर्णिकाः पिडकादारुण-शोफाश्च** ( सुक. ७.२५-३० )
उंदराचा एक प्रकार. तो चावला तर रक्त दुष्ट होऊन विकार होतात, गाठी, चकंदळे, उठाबदार चट्टे, पुळ्या व त्रासदायक सूज.

**–कपोत**–पु., सर्प० **दर्वीकरः** ( सुक. ४.३४ (१) )
सापाचा एक प्रकार.

**–करम्भ**–पु., **स्थावरविषभेदः, यस्य पत्रपुष्पफलानि च विषमयानि भवंति** ( सुक. २.५; असंउ. ४० )
स्थावर विषभेद. ज्याची पाने, फुले, फळे, विषारी असतात असा वृक्ष.

**–कल्क**–पु., **पारदाभ्रककम्पिल्लकादिसाधितोऽयं दिव्यामृतरस इत्यपरपर्यायः, दृढदीपनपाचनः, श्वासकासक्षयपाण्डुरोगविनाशकः**(र.२७.१३७-५४)
महाकल्क. एक औषध. पारा, अभ्रक, कपिला इत्यादी युक्त औषध. याला दिव्यामृतरस असेही म्हणतात. हा चांगलाच दीपक, पाचक. श्वास, कास, क्षय, पांडुनाशक आहे.

**–कल्याणकघृत**–न., घृत० **स्थिरानतरजनीसारिवा-प्रियङ्गुकानीलोत्पलादिभिः साधितमिदं बृंहणीयं, सन्निपातहरमुन्मादचिकित्सायामुपयुक्तम्**
( चचि. ९.४२-४४; सुउ. ३९.२३८ )
सिद्धौषधि तुपाचे नाव. सालवण, तगर, हळद, अनंतमूळ, गव्हला, निळे कमळ, इत्यादिकांनी सिद्ध तूप. हे पौष्टिक, सन्निपातहारक, उन्मादनाशक आहे.

**–कषाय**–पु., **दशसंख्यावच्छिन्नस्यैककार्यकरणार्थोपात्त-स्यौषधगणस्य संज्ञा** ( चक्र. ) **चरकमहर्षिनिर्दिष्टाः पञ्चाशन्महाकषायाः** ( चसू. ४.८ )
विशिष्ट कार्य साधण्यासाठी मिळवलेल्या दहा दहा औषधांच्या काढ्याचे प्रकार. असे हे पन्नास आहेत. यांना महाकषाय म्हटले आहे.

**–कषायसंग्रह**–पु., **महाकषायाणां संग्रहः**
(असंसू. १५.५१) महाकषायांची साठवण.

**–काल**–पु., **रसमण्डपे पूजनीयो नन्दीभृङ्गीप्रभृती–नामेकतमः**, देवता० ( र. ६.२५ )
रस औषधि निर्मितीचे मंडपांत स्थापन करावयाची "देवता." नंदी, भृंगी इ० पैकी एक.

**(–काली)**–स्त्री., **वनस्पती० कृष्णकठिनसारमयो वृक्षः गृहधारणः कृष्णकार्पासी, कृष्णराजिका, बकायनः** (र. १०.७३-७६)
काळा कठिण गाभा असलेला वृक्ष. घराचे खांब करण्यास उपयुक्त. काळी मोहरी, काळी कपाशी, बकाण.

**–कुमुदा**–स्त्री., **वनस्पती० काश्मरी** (रा. ९.१४८)
शिवण.

**–कुम्भा**–स्त्री., **वनस्पती० कट्फलम्** (ध. १.७३)
कायफळ.

**–कुष्ठ**–न., **रोग० कुष्ठभेदः** ( सुनि. ५.९ )
**सप्तभेदाः– कापालमौदुम्बरं, मण्डलमृष्यजिह्वं, पुण्डरीकं, सिध्मं, काकणञ्च** ( चचि. ७.१४-२० )
**द्र० 'कुष्ठ'**
सात महाकुष्ठे. मोठ्या कोडाचे ७ प्रकार. नावे वर आहेत.

**–कुष्ठचिकित्सित**–न., **अध्याय०** (सुचि. १०.१)
अध्यायाचे नाव. यात महाकुष्ठाची चिकित्सा आहे.

**–कुह**–पु., **कफजक्रमि०** ( असंनि. १४.५१ )
**द्र० 'क्रमि'**। कफजक्रमीचे नाव.

**–कृष्ण**–पु., **सर्प० दर्वीकरः** ( सुक. ४.३४(१) )
साप, नाग.
**मूषिक० तद्दष्टलक्षणम्–क्रुद्धपित्तजविकारान्कुरुते। दंशे ग्रन्थिमण्डलकर्णिकाः पिडकादारुणशोफाश्च** (सुक. ७.२५-३०)
उंदीर चावल्याने तीव्र पित्ताचे रोग होतात. दंश झालेल्या ठिकाणी ग्रंथी, मंडल, कर्णिका, पिडका आणि भयंकर सूजही उत्पन्न होते.

**–कोशातकी**–स्त्री., **वनस्पति० धामार्गवभेदः** ( ध. १.१९० ) दोडके ( मोठे ) प्रकार.

**–क्षार**–पु., **लवण० सर्वक्षारः** ( रा. ६.५७ )
सर्व क्षार. अनेक प्रकारची लवणे (मीठ) एकत्र करून बनवलेला क्षार.

**–खदिरघृत**–न., **घृत० खदिरशिंशपाकरंजारिष्ट-वेतसादिसिद्धमिदं कुष्ठविकारे उपयुक्तम्** ( चचि. ७.१५२-५६ )
महाखदिरघृत. खैर, शिसव, करंज, निंब, जलवेतस इ० सिद्ध तूप. कुष्ठ विकारात उपयुक्त.

**–गद**–पु., **अतत्त्वाऽभिनिवेशाख्यो व्याधिः**
**द्र० 'अतत्त्वाभिनिवेश'** ( चचि. १०.६० )
मोठा रोग. तत्वशून्य गोष्टींचा आग्रह धरण्याची वृत्ती.
**मारणात्मकत्वादसाध्यत्वाच्च महत्त्वं येषां ते गदाः– वातव्याधिः, प्रमेहः, कुष्ठमर्शो भगन्दरमश्मरी, मूढगर्भ इत्यष्टौ** ( सुसू. ३३.४ )
महाभयंकर आठ विकार. असाध्य किंवा मारक आहेत असे महारोग. ( वातव्याधि, प्रमेह, कुष्ठ, अर्श, भगन्दर, अश्मरी, मूढगर्भ. )
**राजयक्ष्मा** ( चचि. ८.२७ ) क्षय.

**–गन्ध**–पु., **वनस्पति० कुटजः** ( रा. ९.१९ ) कुडा.
न., **हरिचन्दनम्** ( रा. १२.१९ )
अतिसुगंधी चंदन. पांढरा पिवळा चंदन.
**भैषज्य० बोलम्** ( रा. ६.११७ ) बोळ.

**–गन्धा**–स्त्री., **वनस्पति० केविका** ( रापरि. १०.३३ )
महागंधा. सुगंधाने आकृष्ट करून भुंग्याला मारणारी वनस्पती.

**–गन्धहस्तिन्**–पु., **योग० पत्रागरुमुस्तैलाचन्दन-स्पृक्कादिसाधितोऽयं विषादिहतेषु शमनार्थमुपदिष्टः** ( चचि. २३.७७-८९ )
सिद्धौषधाचे नाव. तमालपत्र, अगरू, नागरमोथा, वेलदोडा, चंदन इत्यादी युक्त. विष पीडिताला शामक म्हणून उपयुक्त.

**–गुण**–वि., **कायवाक्चित्तगुणवान्** ( सुशा. ३.३५ )
गुणवान् शरीर वाचा व मन असलेला.
**सत्वं रजस्तमश्च** ( असंसू. १ )
सत्व रज व तम हे तीन गुण.

**–गुद**–पु., **क्रिमि० कफजोऽयम्** ( चसू. १९.४( ९ )
**द्र० 'क्रमि'** कफज क्रमीचे नाव.

**–गुल्मा**–स्त्री., **वनस्पति० सोमवल्ली** ( रापरि. ३.३; रापरि. ३.२९ ) सोमलता.

**–गुहा**–स्त्री., **वनस्पति० पृश्निपर्णी** ( रा. ४.११७ )
पिठवण.

**–ग्रह**–पु., **राहुः** ( असंउ. ७ ) राहु.

**–ग्रहोपगमन**–न., **चन्द्रसूर्यग्रहणम्** ( चसू. ८.२४ )
ग्रहण, सूर्य चंद्र ग्रहण.

**–घृत**–न., **पुराणघृतम्, एकादशोत्तरशताधिक. वार्षिकघृतम्, तद्गुणाः–कफघ्नं, बल्यं, पवित्रं, मेध्यं, विशेषेण तिमिरापहं, सर्वभूतहरम्**

( सुसू. ४५.१०९-१११ ) द्र० 'घृत'
जुने तूप. एकशे अकरा वर्षापेक्षा अधिक जुने.
**गुण**—कफनाशक, बलकर, पवित्र, बुध्दीला हितकर, सर्व तऱ्हेची घृते–जंतु नाशक. विशेषतः तिमिर–दृष्टिरोगनाशक.

**–घोषा**–स्त्री., वनस्पति० **कर्कटशृङ्गी** ( ध. १.८५ )
काकडशिंगी.

**–चञ्चु**–स्त्री., वनस्पति० **बृहच्चञ्चुः** (रापरि. ४.२०)
मोठी घोळ. चोचीसारखी पाने असलेली शेतात उगवणारी वनस्पती.

**–चतुष्पाद्**–पु., अध्याय० ( चसू. १०.१ )
अध्यायाचे नाव. वैद्य, रोगी, परिचारक, आणि औषध या चिकित्सेच्या मोठ्या आधारांची माहिती यात आहे.

**–चूत**–पु., वनस्पति० **राजाम्रः** ( रा. ११.१० )
नामांकित आंबा.

**–छिद्रा**–स्त्री., वनस्पति० **महामेदा** (रा. ५.१६४)
मोठी मेदा. अष्टवर्गापैकी एक.

**–छाय**–पु., वनस्पति० **वटः** ( रा. ११.११३ )
वड, मोठी विस्तृत छाया असणारा.

**–जटा**–स्त्री., वनस्पति० **रुद्रजटा** ( रापरि. ३.२५ )
सुगंधी पानांची पुष्कळ पाळे असलेली वेल.

**–जम्बू**–पु., वनस्पति० **जम्बूः** ( ध. ५.८३; रा. ११.१३०) मोठे जांभूळ.

**–जव**–वि., **शीघ्रगति**० ( अहृसू. १२.६ )
मोठ्या वेगाचा. वायु.

**–जाति**–स्त्री., वनस्पति० **वासन्ती** ( रा. १०.२३४ )
मोठी जाई, वासंती.

**–जालिनि**–स्त्री., वनस्पति० **धामार्गवः** ( चक. ४.३ )
मोठे दोडके.
**पीतकोशातकी** ( चक्र. चक. ३.१७ )
पिवळ्या फुलाचे दोडके.

**–जाली**–स्त्री., वनस्पति० **आवर्तकी** ( ध. १.१९८ )
मोठे दोडके.
**कोषातकी** ( ध. १.१८९ ) दोडके.

**–ज्वराङ्कुश**–पु., पारदयोग० **पारदगंधकधत्तूरव्योषादिसाधितोऽयं सर्वदोषजज्वरघ्नः** ( र. १२.४३-४६ )
महाज्वरांकुश नावाचे सिद्ध औषध. पारा गंधक धोतरा इत्यादी युक्त. त्रिदोषज ज्वर नाशक.

**–तालेश्वर**–पु., पारदयोग० **पारदतालताप्यशिलादिभिः कृतोऽयं सर्वकुष्ठानां विनाशकः** ( र. २०.१४४-४९ )
महातालेश्वर नावाचे सिद्ध औषध. पारा, हरताळ, माक्षिक मनशील इत्यादी युक्त. सर्वकुष्ठनाशक.

**–तिक्त**–पु., वनस्पति० **महानिम्बः** ( रा. ९.४६ )
मोठा निंब, बकाणा निंब.
**किराततिक्तः** ( ध. १.३५ ) काडेचिराईत.

**–( तिक्ता )**–स्त्री., वनस्पति० **शङ्खिनी** ( रा. ३.३८० ) सांखवेल.

**–तिक्तघृत**–न., घृत० **सप्तच्छदातिविषाशम्याकतिक्तरोहिण्यादिसाधितमिदं पाण्डुरोगे उपयुक्तम्** ( चचि. १६.४३ ) **पैत्तिकेऽसृग्दरे प्रशस्तम्** ( चचि. ३०.९९ )
महातिक्तघृत नावाचे सिद्ध–तूप. पांडुरोग, पित्तज प्रदरात प्रशस्त.

**–तिक्तकघृत**–न., घृत० **अपस्मारभगंदरोदरप्रदरज्वरघ्नम्** ( असंचि. २१ ) द्र० '**महातिक्तघृत**'
महातिक्तघृत नावाचे सिद्ध औषध. अपस्मार, भगंदर, उदर, प्रदर, ज्वर नाशक.

**–तिक्तकसर्पिस्**–न., घृत० **महातिक्तघृतम्** ( सुचि. ९.८ )
महातिक्तकघृत नावाचे सिद्ध औषध. अपस्मार, भगंदर, उदर, प्रदर, ज्वर नाशक.

**–तेजस्**–न., खनिज० **पारदः** ( रा. १३.४० ) पारा.

**–त्रैफल**–न., घृत० **मधुयष्टीकाकोलीद्वयव्याघ्रीकृष्णात्रिफलादिसिद्धमिदं दृष्टिविकारघ्नम्** ( असंउ. १६ )
महात्रिफळाघृत. ज्येष्ठमध, दोन्ही कावळी, रिंगणी, पिंपळी, त्रिफळा, इत्यादि युक्त. दृष्टिविकार नाशक.

**–दण्डा**–स्त्री., वनस्पति० **नागबला** ( रा. ४.४२८ )
नागबला, एक चिकणा.

**–दशन**–वि., **महादन्तः** ( सुसू. ३५.४ )
ज्याचे दात मोठे आहेत असा. ( हे दीर्घायु पुरुषाचे लक्षण आहे. )

**–दारु**–पु., वनस्पति० **देवदारुः** (ध. १.७६) देवदार.

**–दूषक**–पु., धान्य० **शालिः** ( सुसू. ४६.४ )
साळ, भात.

**–देव**–पु., **रसरत्नसमुच्चयकर्त्रा सिंहगुप्तसूनुनाऽऽलोचितस्तन्त्रकर्ता** ( र. १.५-९ )
महादेव, रसरत्न समुच्चायाचा कर्ता. सिंहगुप्ताचा मुलगा वाग्भट ह्याने ज्यांचे ग्रंथ अवलोकन केले त्या ग्रंथकारापैकी एक ग्रंथकर्ता.

**–द्रोण**–न., रत्न० **श्वेतवैकुण्ठम्** ( इन्दु. असंउ. ४२ )
रत्नाचे नाव.

**–( द्रोणा )**–स्त्री., वनस्पति० तद्गुणाः–कटुस्तिक्ता, मेध्या, पारदशोधनी, कफघ्नी, वातार्तिभूतनुद्, अग्निमान्द्यापहा ( रा. ५.५० )
हिं.—गोमा मधुपति.
म.—बहुफूल.
गु.—कुलाम्नुफूल.
बं.—दरुनाफूला.
ता.—तुम्बे कीरे.
महाद्रोणा वनस्पती. तिखट, कडु, बुद्धिवर्धक, पारदाच्या शुद्धिसाठी उपयोगी, कफनाशक, वाताच्या पीडा कमी करणारी व अग्निमांद्य नाशक आहे.

**–(द्रोणी)**–स्त्री., वनस्पति० महाद्रोणा (रापरि.५.५०)
द्रोणपुष्पीच्या फुलासारखी मोठी फुले असलेली वनस्पती.

**–धन**–वि., विपुलधनशाली ( सुचि. ११.११ )
पुष्कळ धन असलेला.

**–नल**–पु., वनस्पति० नलभेदः तद्गुणाः–अतिमधुर ईषत्कषायः, शीतो रुच्यो दीपनो वृष्यः(ध.४.१४२; रा. ८.२२५ )
नळप्रकार. अति गोड, थोडा तुरट, थंड, रुचकर, दीपक, शुक्रवृद्धिकर.

**–निद्रा**–स्त्री., लक्षण० अतिनिद्रा ( असंनि. २.२३ )
फार झोप.

**–निम्न**–न., शारीर० कोष्ठः, महास्रोतः ( चसू. ११.४८; असंसू. २२.१५ )
कोष्ठ; महास्रोतस; तोंडापासून गुदापर्यंतचा मार्ग.

**–निम्ब**–पु., वनस्पति० निम्बभेदः, तद्गुणाः–तिक्तः, शीतः पित्तकफघ्नः, कुष्ठरक्तविकारविषूचिकानाशकः ( ध. १.३१ )
हिं—महानिम्ब.
म.—बकाणा लिम्ब; विलायती निम्ब.
बं.—गोरानिम.
ता.—मलाय०हेम्बु.
फा.—ताक.
बकाणा निंब. कडु, शीत, पित्तकफनाशक, कुष्ठ, रक्तविकार, विसूचिका नाशक आहे.

**–नील**–पु. न., रत्न० इन्द्रनीलम् ( असंसू. १२.१९-२१ ) इन्द्रनील रत्न.
वनस्पति० नीलभृङ्गराजः 'द्र० भृङ्गराज' (रा.४.२२) निळा माका.



तैल० वटप्ररोहपिण्डीतमूलत्वक्कृष्णसैर्यककेतकीस्तन-निर्यासादिसिद्धमिदं तैलं केशरञ्जकम् (र. ३०.५८-६१)
महातेल सिद्धतेलाचे नाव. वडाच्या पारंब्या, दालचिनी, काळा कोन्हांटा, केवडीचा स्तन, यांचा काढा इत्यादींनी सिद्ध असे हे तेल केस काळे करणारे आहे.

**(–नीला )**–स्त्री., वनस्पति० महाजम्बूः द्र० 'जम्बू' ( रा. ११.१३० ) मोठे जांभूळ.
गिरिकर्णी ( रा. ३.१२५ ) गोकर्णी.

**(–नीली )**–स्त्री., वनस्पति० द्र० 'नीली' ( रा. ४.३५३ ) नीळ.

**–नीलघृत**–न., घृत० त्रिफलात्रिकटुसुरसामदयंतिकाऽऽरग्वधादिसिद्धमिदं, भगन्दरकृम्यर्शोनाशकम् ( सुचि. ९.३४-३८ )
महानीलघृत नावाचे सिद्ध औषध. त्रिफळा, त्रिकटु तुळशी, मेंदी, बाहवा, इत्यादींनी सिद्ध. भगंदर, कृमी मूळव्याध नाशक.

**–नीलतैल**–न., तैल० बैभीतकतैले आदित्यवल्लीकृष्णसैरेयकसुरसमार्कबकाकमाच्यादिसाधितमिदं शिरोरोगेषु पाननस्यक्रियादिभिरुपयुज्यते ( चचि. १६.२६८-७५ )
महानील तेल नावाचे सिद्ध तेल. बेहेड्याच्या तेलात सूर्यफुली, काळा कोन्हांटा, तुळस, माका, कामोणी, इत्यादी घालून केलेले तेल. डोक्याचे रोग, वळ्या, केस पिकणे, टक्कल, इत्यादींवर पिणे, नाकांत घालणे, इ० कामात उपयुक्त.

**–पञ्चगव्यघृत**–न., घृत० पञ्चमूलद्वयत्रिफलारजनीकुटजसप्तपर्णादिसिद्धमिदं अपस्मारविनाशनम् ( चचि. १०.१८-२४ )
महापंचगव्यघृत नांवाचे सिद्ध तूप. दोन्ही पंचमुळे त्रिफळा इ० नी सिद्धघृत. अपस्मारनाशक.

**–पञ्चमूलासव**–पु., आसुत० अयं मण्डूकपर्ण्यादीनां शाकानामनुपानत्वेन विहितः ( सुसू. ४६.४३३ )
एका आसवाचे नाव. ब्राह्मी इत्यादी भाज्यांचे अनुपान उपयुक्त मोठ्या पंचमुळांचे आसव.

**–पञ्चाङ्गुल**–पु., वनस्पति० स्थूलैरण्डः द्र० 'एरण्ड' ( रा. ८.४४९ ) मोठा एरंड.

**–पत्र**–पु., वनस्पति० टिण्टुकः ( चक्रं. चचि. १४.१२४ ) टेंटू.

**–( पत्रा )**–स्त्री., वनस्पति० नागबला ( रा. ४.४२७ ) चिकणा ( एक प्रकार. )

**–पद्म**–पु., रोग० विसर्पभेदः द्र० ' विसर्प ' ( असंउ. २ ) विसर्पाचा प्रकार.
**सर्प० दर्वीकरः** ( सुक. ४.३४ ( १ ) नाग.

**–पद्मतैल**–न., तैल० **पद्मवेतसयष्टीमधुकेनिलापद्मकादिसिद्धमिदं वातशोणिते ज्वरे च उपयुज्यते** ( चचि. २९.११०,१३ )
महापद्मतैल नावाचे सिद्ध औषध. पद्मवेतस, ( पद्मकाष्ठ ) जेष्ठमध इत्यादींनी सिद्ध केलेले (तेल) वातरक्त, ज्वर, यावर उपयुक्त.

**–पनस**–पु., **सर्प० मण्डली** ( सुक. ४.३४ ( २ ) सापाचे नाव.

**–पाणि**–वि., **आजानुबाहुः** ( सुसू. ३५.४ )
ज्याचे हात गुडघ्यांना पोचतात असा पुरुष ( अर्जुन)

**–पाद**–वि., **उक्ताङ्गुलिप्रमाणात्किञ्चिदायततरपादयुक्तः** ( सुसू. ३५.४ )
मोठे पाय असणारा. शास्त्रोक्त प्रमाणापेक्षा किंचित लांब पाय असणारा.

**–पारेवत**–न., वनस्पति० **पारेवतभेदः** द्र० 'पारेवत' ( रा. ११.९० ) एक प्रकारचा खजूर.

**–पार्श्व**–वि., **उक्ताङ्गुलिप्रमाणाधिकपार्श्वयुक्तः** ( सुसू. ३५.४ )
शास्त्रोक्त प्रमाणापेक्षा मोठ्या बरगड्या असणारा.

**–पालेवत**–न., वनस्पति० **पारेवतभेदः** द्र० 'पारेवत' (ध. ५.६६) पारेवतप्रकार, खजूर.

**–पाशुपत**–पु., वनस्पति० **वसुकः** (ध. ४.१९) पांढरी वसु.

**–पिण्डिन्**–पु., वनस्पति० **कषाय उष्णस्त्रिदोषशमनश्चर्मरोगरक्तदोषजित्** (रा. ९.३३)
महापिंडी. एक वनस्पती. तुरट, उष्ण, त्रिदोषशामक, रक्त व चामडीचे रोग नाशक.

**–पिण्डीतक**–पु., वनस्पति० **महापिण्डी** (रापरि. ९.३३) द्र० ' महापिण्डिन् '
**वाराहमदनः** (रापरि. ८.२८) काळे मोठे गेळफळ.

**–पीलु**–पु., वनस्पति० **बृहत्पीलुः** द्र० 'पीलु' (रा. ११.६३ ) मोठा पीलु.

**–पुट**–न., पुट० **द्विहस्तनिम्ने द्विहस्तचतुरस्रे खाते–कुण्डे–वनोपलसहस्रेण पूरणं कुर्यात्, तत्र क्रौञ्च्यां प्रयत्नेन रुद्धं पुटनौषधं पिष्टिकोपरि निक्षिपेत्। अनन्तरं वनोपलसहस्रार्धं क्रौञ्चिकोपरि विन्यसेत् वह्निं च प्रज्वालयेत्** ( र. १०.५२-५३ )
दोन हात लांब–रुंद–खोल खड्ड्यात एक हजार रानशेणी घालून त्यावर मध्यभागी रानशेणीचा भुगा ठेवून पुट द्यावयाचे. औषधांची योग्य तऱ्हेने बंद केलेली मूस ठेवावी. व वरून आणखी पाचशे रानशेणी घालून अग्नि द्यावा. यामुळे त्या औषधाला महापुट मिळेल.

**–पुरुषदन्ता**–स्त्री., वनस्पति० **शतावरी** ( चचि. ९.४६ ) शतावरी.
**महामेदा** ( इन्दुः, असंउ. ९ )
महामेदा. अष्टवर्गापैकी एक.
**सहस्रावीर्या, शतावरीभेदः** ( ध. १.२९३ )
शतावरीप्रकार.

**–पुरुषदन्तिका**–स्त्री., वनस्पति० **शतावरीभेदः, सहस्रवीर्या** द्र० 'शतावरी' ( रा. ४.४४१ )
शतावरी प्रकार.

**–पुष्प**–न., वनस्पति० **कोविदारः** ( रा. १०.२९४ ) कांचन.
**कफजक्रमि० दर्भपुष्पमहापुष्पप्रभृतीनां षण्णामेकतमः** ( सुउ. ५४.१२ )
एका कफज क्रमीचे नाव, दर्भकुसुम महाकुसुम इ० ६ प्रकारच्या क्रमीपैकी.

**–पृष्ठ**–वि., **उक्ताङ्गुलिप्रमाणात्किञ्चिदधिकपृष्ठयुक्तः** ( सुसू. ३५.४ )
मोठी पाठ, शास्त्रोक्त प्रमाणापेक्षा किंचित मोठी पाठ.

**–पैशाचिकघृत**–न., घृत० **जटिलाकेशीपूतनामर्कटीवचात्रायमाणादिसाधितमिदं उन्मादग्रहापस्मारनाशनं बुद्धिस्मृतिकरं च** (चचि. ९.४५-४८)
महापैशाचिक घृत नावाचे औषधी तूप. जटामांसी भूतकेशी हिरडा इत्यादींनी युक्त. उन्माद, ग्रहबाधा, अपस्मारनाशक, बुद्धिस्मृतिकर तूप.

**–प्रकृति**–स्त्री., **सत्वरजस्तमःकृतः स्वभावः, चित्तप्रकृतिः** ( ड. सुशा. ४.९९ )
सुस्वभावी; सत्व, रज व तम यांचे पैकी एकाचे आधिक्य असलेल्या स्वभावाची प्रकृती.

**–प्रसवशक्तित्व**–न., **अतिप्रजोत्पादनसामर्थ्यम् इदं कौबेर-कायलक्षणम्** (सुशा. ४.८४ )
पुष्कळ प्रजा उत्पादन करण्याची शक्ति (हे कौबेरकाय पुरुषाचे लक्षण आहे. )

**–फल**–पु., वनस्पति० **बिल्वः** ( ध. १.१०६ )
बेलफळ.

पीलुभेदः बृहत्पीलुः, द्र० 'पीलु' (रा. ११.६३) मोठा पीलु.

**( -फला )**-वि., शारीर० हृदयमूला धमनी (चसू. ३०.३)

हृदयापासून निघणारी मोठी धमनी-शीर.

स्त्री., **वनस्पति० कोशातकी** (ध. १.१९०) दोडके.

**नीलिनी** (रा. ४.३५०) काळा दाणा.

**इन्द्रवारुणी** (ध. १.२५०) कडु वृंदावन.

**नागबला** (रा. ४.४२७)
एक प्रकारचा चिकणा. गांगेरुकी.

**क्षीरतुम्बी** (रा. ७.२३८) गोड दुध्या भोपळा.

**कटुतुम्बी** (ध. १.१७०) कडु दुध्या भोपळा.

**जम्बूभेदः महाजम्बूः**, द्र० 'जम्बू' (रा. ११.१३०; ध. ५.८३) मोठे जांभूळ, जांभळाचा प्रकार.

**मधुकर्कटी** (ध. ५.३१) मोठे गोड महाळुंग.

**मातुलुङ्गभेदः, वनबीजपूरकं**, द्र० 'मातुलुङ्ग' (रा. ११.३४) महाळुंगाचा प्रकार. रानमहाळुंग.

**-बन्ध**-पु., पारदबन्ध० (र. ११.९३) 'द्र० पारद'
पाऱ्याचा एक बंध म्हणजे घट्ट झालेला पाऱ्याचा प्रकार.

**-बभ्रु**-पु.,**प्राणि०नकुलभेदः बिलेशयवर्गीयाणामेकतमः** (सुसू. ४६.७८)
मुंगुस (एक प्रकारचा) बिळात रहाणारा.

**-बल**-पु., **वनस्पति० वंशः** (रा. ७.२१५)
बाम्बू, टोकर.

**धन्वनः** (रा. परि. ९.२०) धावडा.

**तमालः** (रा. परि. ९.१५) ताड.

**प्लक्षः** (रा. ११.१२५) पिंपरी.

**( -बला )**-स्त्री., **वनस्पति० नीलिनी** (रा. ४.३५१)
काळा दाणा.

**वत्सादनी** (रापरि. ३.३३) गुळवेल.

**बला० तद्गुणाः-शुक्रवृद्धिकरी, बल्या, वातघ्नी, हृद्रोगाऽर्शःशोफविषमज्वरनाशिनी** (ध. १.२८२)

हिं.—खिरिटी.

**म.—सादेव; चिकणाभेद.**

गु.—बाणमेथी.

ता.—अथिबल्लाचेडी.

फा.—शाम्बीडेबारी.

**गुण**-शुक्र वाढविणारी, बलकर, हृद्रोग, मूळव्याध, सूज, विषमज्वरनाशक, वातनाशक.

**-बलबला**-स्त्री., **वनस्पति० बलाभेदः** (ध. १.२८७) चिकणाप्रकार.

**-भद्रा**-स्त्री., **वनस्पति० काश्मरी** (रा. ९.१४७)
शिवण.

**-भल्लाततैल**-न., **तैल० इदं सर्वकुष्ठानि नाशयति** (र. २०.१६३-१६५)
महाभल्लातक तैल नावाचे सिद्ध तेल. सर्व कुष्ठ नाशक.

**-भूत**-न., **प्रकृतेर्विकार० विशेषगुणयुक्तमाकाशादि-द्रव्यम्, खं वायुरग्निरापः पृथिवी-इत्येतानि पञ्च-महाभूतानि तद्गुणाः-शब्दस्पर्शरूपरसगन्धाश्च** (चशा. १.२७) **तत्र अप्रतिघातचलत्वौष्ण्यद्रवत्व-काठिन्यानि यथाक्रमं लिङ्गानि ज्ञेयानि** (असंशा. ५)

पंचमहाभूते. प्रकृतीचे विकार, शब्दादी विशेषगुण युक्त आकाश इत्यादी द्रव्ये, गुणक्रमाने शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध, हालचालीला अडथळा न करणे, चलत्व, उष्णता, पातळपणा व कठीणपणा ही त्यांची ओळखण्याची चिन्हे होत.

**-भूतराव**-न., **घृत० नतमधुककरञ्जलाक्षापटोली-समङ्गादिसिद्धमिदं ग्रहोन्मादकुष्ठज्वरनाशनम्** (असंउ.८)

महाभूतराव नावाचे सिद्धघृत. तगर ज्येष्ठमध इत्यादी घटित. हे ग्रह, उन्माद, कुष्ठ, ज्वरनाशक.

**-भूतविकारप्रकृति**-स्त्री., **महाभूतविकाराणां स्वभावो दोषप्रकृतिहेतुः** (चवि. ८.९५)
पंचमहाभूतापासून उत्पन्न झालेल्या विकारांनी (दोषांनी) झालेली स्वाभाविक स्थिति-अवस्था (स्वभाव).

**-भूताग्नि**-पु., **भूताग्निः** (असंशा. ६.५९)
पंचमहाभूतांचा अग्नि.

**-भृङ्ग**-पु., **वनस्पति० नीलभृङ्गराजः**, द्र० 'भृङ्गराज' (रा. ४.२२) निळा-काळा माका.

**-भेरी**-स्त्री., **वनस्पति० वचा** (र. ३०.५७) वेखंड.

**इन्द्रवारुणी** (र. ३०.५७) कडु इंद्रावण, कवंडळ.

**-मन्दार**-पु., **वनस्पति० अर्कः** (र. १२.४८)
मोठी पांढरी रुई.

**-मर्मन्**-न., **मर्म० शिरोहृदयबस्तय इति त्रीणि महामर्माणि** (चसि. ९.७) **मूर्धजिह्वबन्धनकण्ठ-हृदयनाभिबस्तिगुदा इति सप्त महामर्माणि** (असंशा. ५)

मोठी मर्मे. शिर हृदय आणि बस्ति ही तीन चरकमताने व शिर, जिभेचे बंधन, कंठ, हृदय, नाभि, बस्ति व गुद ही सात अष्टांगसंग्रहकार वाग्भटाच्या मताने.

**–मांसी**–स्त्री., वनस्पति० **रुदन्ती** ( रापरि. ५.१५ ) रानहरबरा.

**–मायूरघृत**–न., सिद्धघृत० **जीवन्तीत्रिफलामेदामृद्विकापरूषकादिसिद्धं पक्षपित्तान्त्रादिवर्जितमयूरावयवेषु साधितमिदम् अखिलशिरोरोगकासश्वासमन्याग्रहपृष्ठग्रहशोषशुक्रदोषाऽऽदिविकारेषु नस्यपानाऽभ्यङ्गबस्त्यादिभिरुपयुक्तम्** ( चचि.२६.१६७-१७४ )
महामायूरघृत नावाचे सिद्धौषध ( तूप ). हरीण दोडी, त्रिफळा, मेदा, इत्यादी तसेच पंख, पित्त व आंतडे सोडून बाकीचे मोराचे शरीर यांनी सिद्ध तूप. सर्व शिरोरोग, खोकला, श्वास, मान, पाठ जखडणे, शोष, शुक्रदोष, इत्यादी मध्ये पिणे, बस्ति अभ्यंग, नाकात घालणे इ० नी उपयुक्त.

**–मायूरी**–स्त्री., विद्या० ( असंउ. १ ) **चतुःसहस्त्री** ( इन्दु. असंउ. १ ) एक विद्या.

**–मार्तण्डतैल**–न., तैल० **निम्बाङ्कोलवन्हिराजवृक्षाक्षस्नुगादिसाधितमिदं कुष्ठकण्डूकृमिनाशनम्** ( र. २०.१६९-७२ )
महामार्तण्डतैल नावाचे सिद्ध तेल. निंब, अंकोल, चित्रक, बहावा, इ० नी सिद्ध. कुष्ठ, कडू, कृमिनाशक.

**–मीन**–पु., **सामुद्रमत्स्य०** ( सुसू. ४६.११८ ) समुद्रातील मोठा मासा.

**–मुण्डनिका**–स्त्री., वनस्पति० **महामुण्डी** ( रा. ५.२२० ) मोठी मुंडी.

**–मुण्डी**–स्त्री., वनस्पति० **स्वनामख्याता, तद्गुणाः– तिक्तोष्णा, स्वरकृद्रोचनी, मेहकृद्रसायनी च** ( रा. ५.२२२ )
हिं.—मुण्डी.
**म.—बरसवोडी, बोंडथरा.**
गु.—मुण्डी.
बं.—मुण्डी.
ता.—कोट्टक.
मुंडी–कडु, उष्ण, आवाज ठीक करणारी, रुचि उत्पन्न करणारी, मेह करणारी आणि रसायनी आहे.

**–मुनि**–पु., ऋषि० **राजर्षिप्रमुखो धन्वन्तरिः** ( सुसू. ४६.५३२) राजर्षींमधीलप्रमुख. धन्वन्तरी.

वनस्पति० **तुम्बरुः** (ध. २.४२) रान कोथिंबीर.

**–मूल**–वि., **गम्भीरमूलम्** ( सुनि. ९.५ ) खोल मुळे असलेला.

**(–मूला )**–वि., **महद् नाम हृदयं मूलं यस्याः, सा धमनी** ( चसू. ३०.३ )
महामूला नावाची धमनी. महद् म्हणजे हृदय जिचे मूळ आहे अशी धमनी. ( शीर )
स्त्री., हिध्मा० द्र० **'हिक्का'** ( असंनि. ४.२६ ) उचकी.

**–मूषा**– स्त्री., मूषा० **तले कूर्परसन्ध्याकारा क्रमेणोपरिभागे विस्तृता स्थूलवृन्ताकवच्च स्थूला मूषा, अयोऽभ्रकसत्त्वादेर्द्रावणे पुटे चोपयुक्ता** ( र. १०.३० )
मोठी मूस. मोठ्या, जाड व लांबच्या वांग्याच्या आकाराची तळात कोपराच्या संधीच्या आकाराची क्रमाने वर विस्तृत असलेली. लोह अभ्रक सत्व यांचे पुट किंवा द्रावण करण्यास उपयुक्त.

**–मृग**–पु., मृगसमूह० **वराहमहिषन्यङ्कुरुरुरोहितवारणसृमरश्चमरखङ्गगवयाश्चेति दश महामृगाः** ( अहसू. ६.५१ ) **मांसगुणः–शीतवीर्यः** (असंसू. ७.९६) **न्यङ्कुः महामृगेषु श्रेष्ठः** (असंसू. ७)
मृगाचा समुदाय. डुक्कर, म्हैस, सांबर, शरदऋतूत शिंगे गळतात ते हरिण, लाल हरिण, नावाची तिन्ही हरणे, हत्ती, रानघोडी, रानगाय, गेंडा व गळ्याखाली पाळ असून वशिंड नसणारा गाईसारखा पशु.
**गुण**—यांचे मांस थंड.

**–मेदा**–स्त्री., वनस्पति० **मेदाभेदः, स्वादुः, शीता, कफपित्तवर्धनी, वातघ्नी, दाहरक्तपित्तज्वरक्षयनाशिनी** (ध., १.१२७; चसू. ४.९) द्र० **'मेदा'**
मोठी मेदा. गोड, थंड, दाह, रक्तपित्त, ज्वर, क्षयनाशक वातघ्न, कफपित्तवर्धक.

**–मोह**–पु., लक्षण० **जन्ममरणकालिकः अतिशयेन संज्ञानाशः** ( चनि. १.३५ )
जन्म व मरणकाली होणारा अतिशय संज्ञानाश.

**–यमलपत्रक**–पु., वनस्पति० **कोविदारः** ( ध. १.१९६ ) कांचन.

**–योगेश्वरी**–स्त्री., वनस्पति० **बलामोटा** ( धपरि. ४.३ )
बलामोटा. सूक्ष्म मुळीची हिरवी वनस्पती, जयन्ती, ब्राह्मी, शेवरी.

**–योनि**–स्त्री., योनिरोग० तत्संप्राप्तिः–दुःखशय्यायां मैथुनात्कुपितो वायुर्योन्यास्यं गर्भकोष्ठं च विष्टभ्य योनिं विवृतां स्थानस्रस्तां वातिक्याख्यव्यापदमिव दुःखितामुत्सन्नमांसां महारुजां च कुरुते (चचि.३०.३५-३७; सुउ. ३८.१९; असंउ. ३८)
महायोनि. योनीचा रोग. खडबडीत शय्येवर, वेड्यावाकड्या शरिरावस्थेत मैथुन केल्याने प्रकुपित वायु योनीचे तोंड व गर्भाशय यात विकृति करून योनि विस्तृत व स्थानभ्रष्ट आणि अति वेदनापीडित होते. त्या ठिकाणचे मांस वर उचलून आल्याने अति दुःखी होते.

**–रक्त**–न., भैषज्य० प्रवालम् (ध. ६.६४) प्रवाल.

**–रजत**–न., खनिज० सुवर्णम् (रा. १३.१) सोने.

**–रत्न**–न., रत्नवर्ग० पञ्चमहारत्नानि–पद्मरागमरकतवज्रेन्द्रनीलपुष्परागाश्चेति (र. ४.५)
पाच महारत्ने. माणिक, पाचू, हिरा, नीळ, व पुष्पराग.

**–रस**–पु., रसशास्त्रे श्रेष्ठत्वेन स्वीकृतान्यष्टखनिजानि द्रव्याणि, अधस्तनोक्तानि द्रव्याणि महारसत्वेनाद्यतने काले संमतानि–अभ्रं, वैक्रान्तं, माक्षीकं, विमलं, सस्यकमद्रिजं, चपलो रसकश्चेति, महारसत्वेन राजनिघण्टौ वर्णितानि–दरदः, पारदः, सस्यो वैक्रान्तमभ्रकं, माक्षिकं विमलं चेति (रा. २२,१; र. ६.४३)
अभ्रक, बैक्रान्त, माक्षीक, विमल, मोरचूद, शिलाजित, चपल कलखापरी असे आठ महारस आहेत. श्रेष्ठ खनिज पदार्थ. राज निघंटूत हिंगूळ, पारा, मोरचूद वैक्रांत, अभ्रक, सुवर्णमाक्षिक, व विमल हे महारस आहेत.
पु., न., खनिज० पारदः (ध. ६.३७) पारा.
न., असुत० काञ्जिकम् (ध. ६.२४९) कांजी.

**–राजगिरि**–पु., वनस्पति० आरग्वधः (र. ५.१७७) बाहवा.

**–राजचूत**–पु., वनस्पति० राजाम्रः (रा. ११.९) उत्तम आंबा.

**–राजद्रुम**–पु., वनस्पति० आरग्वधः (रा. ९.३३४) बहावा.

**–राजफल**–पु., वनस्पति० राजाम्रः (रा. ११.१०) उत्तम आंबा.

**–राजाम्रक**–पु., वनस्पति० राजाम्रः (रा. ११.९) उत्तम आंबा,

**–राष्ट्र**–न., महद्राष्ट्रम्, कुरुक्षेत्रात्पूर्वदेश० अत्र मगधासु महाराष्ट्रमिति मगधस्य महाराष्ट्रत्वेन निर्देशः कौशल्यदेशस्योल्लेखश्चास्ति (का उपोद्घात काखिल)
मोठे राष्ट्र, कुरुक्षेत्राच्या पूर्वेकडील प्रदेश. मगध देश गंगेच्या दक्षिणेतील एक विभाग. याला कौशल्य म्हणतात.

–(**राष्ट्री**)–स्त्री., वनस्पति० तद्गुणाः–कटुः कषाया, तीक्ष्णा, मुखशोधनी, व्रणकीटादिदोषघ्नी रसदोषनिबर्हणी (रापरि. ४)
मराठी–महाराष्ट्री वनस्पती. **गुण**—तिखट, तुरट, तीक्ष्ण, मुखशोधक, व्रण कीटादींचे दोष नाहीसे करणारी, पारदातील दोष नाहीशी करणारी.
जलपिप्पलिका (र., ११.५२-५७) जलपिंपळी.
कण्टकारी (र., ११.५२-५७) रिंगणी.

**–राष्ट्रिक**–न., वनस्पति० जलपिप्पलिका (र., २४.३६) जलपिंपळी.
महाबृहती (र. २४.३६) मोठी डोरली.

(**–राष्ट्रिका**)–स्त्री., वनस्पति० जलपिप्पलिका (र. २४.३६) जलपिंपळी.
महाबृहती (र., २४.३६) मोठी डोरली.

**–रोग**–पु., रोगसमूह० वातव्याधिरश्मरीकुष्ठं प्रमेह उदरं, भगन्दरोऽर्शांसि ग्रहणी चेत्यष्टौ रोगा महारोगाः प्रकीर्त्यन्ते (असंनि. ८.३२)
मोठे रोग. वातव्याधि, मूतखडा, कुष्ठ, प्रमेह, उदर, भगंदर, मूळव्याध आणि ग्रहणी हे विकार.

**–रोगाध्याय**–पु., अध्यायसंज्ञा० (चसू. २०.१)
या नांवाचा अध्याय. यात मोठे रोग व त्यांची माहिती आहे.

**–ललाट**–वि., उक्ताङ्गुलिप्रमाणात्किञ्चिदधिकललाटयुक्तः (सुसू. ३५.४)
मोठ्या कपाळाचा. शास्त्रोक्त प्रमाणापेक्षा किंचित अधिक मोठे कपाळ असलेला.

**–लोह**–न., खनिज० कान्तलोहम् (रा. १३.२७)
एक उत्तम प्रतीचे लोह.

**–वज्रकतैल**–न., तैल० सिद्धार्थककरञ्जद्वयहरिद्राद्वयरसाञ्जनादिसिद्धमिदं, कुष्ठे उपयुज्यते (सुचि. ९.५७-६४)
महावज्रकतैल नावाचे तेल. सिद्ध तेल. मोहरी, दोन्ही करंज, हळद इत्यादीयुक्त तेल. कुष्ठावर उपयुक्त.

**–वज्रकसर्पिस्**–न., घृत० वासामृतानिम्बवरापटोलादिसाधितमिदं, कुष्ठश्वित्रप्लीहवर्ध्माऽश्मगुल्मघ्नम् ( असंचि. २१ )
या नावाचे सिद्धौषधी तूप. अडुळसा, गुळवेल, निंब इत्यादी साधित कुष्ठ, कोड, प्लीहा, अंडवृद्धि, मूतखडा गुल्म नाशक.

**–वदन**–वि., उक्ताङ्गुलिप्रमाणात्किञ्चिदधिकवदनयुक्तः ( सुसू. ३५.४ )
मोठा चेहेरा असलेला, शास्त्रोक्त प्रमाणापेक्षा किंचित अधिक मोठे तोंड असलेला.

**–वर्षाभू**–पु., वनस्पति० पुनर्नवाभेदः, द्र० 'पुनर्नवा' ( ध.१.२७६ ) पुनर्नवाप्रकार.

**–वल्ली**–स्त्री., वनस्पति० कट्वी ( रापरि. ३.४३ )
जाड पण दिसायला सुरेख फांद्या असलेली कडु वेल.
**क्षीरतुम्बी** ( रा. ७.२३९ ) दुध्या भोपळा.
**माधवीलता, श्वेतालाबुः** ( असंचि. २३ )
कस्तुर मोगरी, दुध्या भोपळा.
**कटुवल्लिका** ( असंचि. २३ ) कुटकी.

**–वसु**–न., खनिज० रौप्यम् ( ध. ६.६ ) रुपे, चांदी.

**–वात**–पु., रोग० वातव्याधिरयं, धावनप्रलापाऽऽक्षेपकादिवातविकाराः ( र. १२.६४-७३ )
वाताचा विकार. धावणे, बडबडणे, हातपाय झटकणे इत्यादी विकार.

**–वातव्याधिचिकित्सित**–न., अध्यायसंज्ञा० ( सुचि. ५.१ )
या नावाचा अध्याय. मोठ्या वातविकारांची चिकित्सा यात आहे.

**–विकार**–पु., रोगसमूह० ( असंसू. २०.१८ ) द्र० 'महारोग' रोगाचा समूह.

**–विद्या**–स्त्री., पारदयोग० पारदाभ्रनागकान्तादिसाधिता इयं प्रमेहनाशिनी ( र. १७.४३-४७ )
या नावाचे सिद्धौषध. पारा, अभ्रक शिसे इत्यादी युक्त योग. प्रमेहनाशक.

**–विष**–पु., प्राणि० गोधा ( ध. परि. ६.३९ )
गोधा, घोरपड.
न., विष० कालकूटशृङ्ग्यादिमारकं विषम् ( र. २९.१ )
ताबडतोब मारणारे विष, कालकूट शृंगी इत्यादी.
**कन्दविष० तल्लक्षणम्, महाविषेण हृदये ग्रन्थिशूलोद्गमौ भृशं भवतः** ( सुक. २.५-१७, असंउ. ४० ) द्र० 'कन्दविष'
महाकन्दविष. याने हृदयात गाठ, शूल अतिशय होतात.

**–विषवृश्चिकदंश**–पु., तीक्ष्णवृश्चिकदंशः द्र० 'वृश्चिक' ( असंउ. ४३ )
तीक्ष्ण विषारी विंचवाचा दंश.

**–वीर**–पु., वनस्पति० एकवीरः ( रापरि. ८.८ )
एकवीर. एक वनस्पति.
**करवीरः** ( रा. १०.१ ) कण्हेर.
**पारदयोग० पारदतुत्थविषतीक्ष्णगंधमौक्तिकादिसाधितोऽयं ग्रहणीक्षयादिहरः** ( र. १४.७१-७४ )
महावीर नावाचे सिद्धौषध. पारा, मोरचूद इत्यादी युक्त. ग्रहणी, क्षय इत्यादीहारक औषध.

**–वीर्य**–पु., वनस्पति० गृष्टिः, वाराहीकन्दः ( रा., ७. १३१ )
डुकरकंद, डुकरकंदासारखे एक वेलीचे फळ.

(**–वीर्या**)–स्त्री., वनस्पति० सहस्रवीर्या, शतावरीभेदः द्र० 'शतावरी' (रा., ४.४४२) शतावरीप्रकार.

**–वृक्ष**–पु., वनस्पति० स्नुही ( चवि. ८.१३६; ध. १.२३५ ) त्रिधारी निवडुंग.
**पीलुभेदः बृहत्पीलुः**, द्र० 'पीलु' (रा., ११.६३)
मोठा पीलु.

**–वृक्षक्षीर**–न., स्नुह्याः क्षीरम् ( सुशा. १०.२१ )
त्रिधारी निवडुंगाचा चीक.

**–वृक्षपयस्**–न., स्नुहीक्षीरम् ( सुउ. ४१.४८ )
त्रिधारी निवडुंगाचा चीक.

**–वेगवती**–स्त्री., वनस्पति० सोमसमवीर्या महौषधिः अस्या उत्पत्तिस्थानम्, नलसेतुर्मलयश्च ( सुचि. ३०.५-३६ )
सापाच्या कांतीप्रमाणे दिसणारी शरदृतूत जोराने फोफावणारी सोम वनस्पतीसारख्या प्रभावाची वनस्पती. नलसेतु आणि केरळ प्रदेशामध्ये ही होते.

**–व्याहृति**–स्त्री., शब्दसमुदाय० 'भूः, भुवः, स्वः' इति ( सुसू. २.४ )
एक शब्दसमुदाय. भूः, भुवः, स्वः इत्यादी.

**–व्रीहि**–पु., धान्य० द्र० 'व्रीहि' ( चनि. ४.५; ( ध. ६७२ ) एक प्रकारचा तांदूळ.

**–शङ्ख**–पु., भैषज्य० बृहच्छङ्खनाभिः ( र. २५.१९ )
मोठ्या शंखाची नाभि, गाभा,

शारीर० मनुष्यकपालम् ( र. २५.१९ )
माणसाची डोक्याची कवटी.

**–शण**–पु., वनस्पति० शणपुष्पी ( ध. १.२०० )
सण. तागाच्या झाडासारखी पिवळी फुले येणारी वनस्पती.

**–शतावरी**–स्त्री., वनस्पति० स्वनामख्याता सहस्रवीर्या, तद्गुणाः–मधुरा, तिक्ता, शीता, वृष्या, त्रिदोषघ्नी, महाश्रेष्ठरसायनी ( रा. ४.४४१ )
हिं.—शतावर.
**म.—शतमूळी, आसवली.**
गु.—शतावरी.
बं.—शतमूली.
ता.—तण्णीर, चतावरि.
फा.—गुर्जदस्ति.
महाशतावरी. मधुर, कडु, शीत, शुक्रवर्धक, त्रिदोषनाशक अशी महाश्रेष्ठ रसायनी आहे.

**–शब्दा**–वि., लक्षण० महान्तं शब्दं कुर्वाणा (हिध्मा) ( असंनि. ४.२६ ) मोठ्या आवाजाची ( उचकी ).

**–शर**–पुं., वनस्पति० द्र० 'शर' ( रा. ८.२१२ )
शर, बाण गवत.

**–शाखा**–स्त्री., वनस्पति० नागबला ( रा. ४.४२७ )
चिकणाभेद.

**–शालि**–स्त्री., धान्य० शालिवर्गे एकः शालिः द्र० 'शालि' ( चसू. २७.८; सुसू. ४६.४;
ध. ६.६९-७१ ) स्थूलशालिः ( रा. १६.९० )
जाड मोठी शालि ( तांदूळ ) मोठ्या दाण्याचे भात.
व्रीहिः ( रा. १६.१०५ ) एक प्रकारचा तांदूळ.

**–शिम्बी**–स्त्री., वनस्पति० असिशिम्बी
( रापरि. ७.९७ ) महाशिंबी, तलवारीसारखी शेंग.

**–शिरा**–स्त्री., सर्प० दर्वीकरभेदः ( सुक. ४.३४(१) )
नाग जातीच्या सर्पाचा एक प्रकार.

**–शुण्डी**–स्त्री., वनस्पति० हस्तिशुण्डी
( रापरि. ५.२० )
हस्तिशुण्डी. धूसर वर्णाची पाने असलेली, सन्निपातज्वर नाशक वनस्पती.

**–शुभ्र**–न., खनिज० रौप्यम् ( रा. १३.७ )
रुपे, चांदी.

**–शूक**–पु., धान्य० शालिभेदः द्र० 'शालि'
( सुसू. ४६.४ ) एक प्रकारची साळ.

**–शृङ्ग**–पु., पशु० अष्टपादः, शरभः
( ध.परि.६.३६; २९३ )
मोठी शिंगे. आठ पाय असणारा, पर्वतात राहाणारा पशु.

**–शौण्डी**–स्त्री., वनस्पति० कटभी ( रापरि. ९.३८ )
मालकांगोणी.

**–शौषिर**–पु., दन्तमूलगतरोगः, दन्तमांसस्य सर्वदोषजश्चायं सप्तरात्रान्मारयति । अस्मिन् वेष्टेभ्यो दन्ताश्चलन्ति, ताल्वोष्ठदन्ता अप्यवदीर्यन्ते, दन्तमांसानि पच्यन्ते, मुखं च परिपीड्यते
( सुनि. १६.१९-२० )
दाताचे मुळांशी होणारा विकार. दाताचे मांसाचा त्रिदोषज रोग० दात हालतात हिरड्यांमधे दात हालतात, टाळू, ओठ, दात, फाटतात, हिरड्या पिकतात. तोंडात वेदना होतात. सात दिवसात मारतो.

**–श्यामा**–स्त्री., वनस्पति० वृद्धदारुकः
( सुसू. ३८.२९-३० ) वरधारा.
शिंशपा ( ध. ५.१२१ ) शिसव.

**–श्रावणिका**–स्त्री., वनस्पति० महामुण्डी
( ध. १.१६०; रा. ५.२१९ ) मोठी मुंडी.

**–श्रावणी**–स्त्री., वनस्पति० अलम्बुषा ( चक्र. )
शीतपुष्पा ( चचि. १(४).६ ) सोमसमवीर्या महौषधिः ( सुचि. ३०.५ )
महाश्रावणी. सोमासारखी प्रभावी महौषधि. साधारण एक हात उंच, दोन अंगुळे पाने व निळ्या कमळासारखी फुले येणारी व काजळासारखी काळी फळे असलेली महावनस्पती. महौषधी.
बृहन्मुण्डितिका ( चक्र. चचि. २८.१६० )
मोठी मुंडी.

**–श्वास**–पु., ( परिव० ) रोग० श्वासभेदः
( चचि. १७.४६-४८; सुउ. ५१.१२ ) द्र. 'श्वास'
महाश्वास; श्वासरोगाचा प्रकार.

**–श्वेता**–स्त्री., वनस्पति० गिरिकर्णी
( सुसू. ३८.१६-१७; ध. ४.८५; असंउ. ४ )
गोकर्णी.
कटभी ( चसू. ४.१३; रापरि.९.३८ ) मालकांगोणी.
वन्ध्याकर्कोटिका ( सुसू. ३८.१६-१७ ) वांझकटोली.

**–षष्टिक**–पु., षष्टिकभेदः, द्र० 'षष्टिक'
( सुसू. ४६.८ ) साठे तांदूळ.

**–समङ्गा**–स्त्री., वनस्पति० महाबला ( रा. ४.४३२;
ध. १.२८० ) मोठा चिकणा.

**–सरस्वतीचूर्ण**–न., योग० अश्वगंधाजमोदावचाकुष्ठादिसाधितमिदं चूर्णं मूकत्वं, बुद्धिजाड्यं च हरति ( र. २४.७१-७३ )
महासरस्वतीचूर्ण, नावाचे सिद्ध औषध. आसकंद, ओवा, वेखंड कोष्ट इ० युक्त चूर्ण मुकेपणा व बुद्धिमांद्य नाहीसे करते.

**–सर्ज**–पु., वनस्पति० असनः ( ध. ५.१२५ )
असाणा.
**पनस** ( रा परि. ११.९ ) फणस.

**–सर्प**–पु., सर्प० दर्वीकरभेदः ( सुक. ४.३४ ( १ )
सापाचा प्रकार.

**–सह**– वनस्पति० कुब्जकः ( ध., ५.१४६ )
काटेशेवंती.

**–( सहा )**–स्त्री., वनस्पति कुब्जकः ( ध., ५.१४६ )
काटेशेवती.
**मुद्गपर्णी** ( चक. ४.१६ )
मुगाच्या पानासारखी पाने असणारी वनस्पती. रानमूग.
**माषपर्णी** ( सुसू,३३.४-५; ध. १.१८६ )
उडदाच्या पानासारखी पाने असणारी वनस्पती रानउडीद.
**राजतरणी** ( स. १०.२४६ ) शेवंती.

**–सार**–पु., वनस्पति० खदिरभेदः विट्खदिरः, द्र० ' खदिर ' ( रा., ८.३८ ) शेण्या खैर.

**–सुगन्ध**–पु., योग० प्रपौण्डरीकसरलदेवदारुकुटन्नटादिपञ्चाशीत्यौषधिसिद्धोऽथं सर्वविषहरः ( असंउ. ४७ )
महासुगंध. सिद्धौषधाचे नाव, कमल, सरळ देवदार इत्यादींनी युक्त. सर्वविषहारक.

**–( सुगन्धा )**–स्त्री., वनस्पति० रास्ना ( इन्दु ) ( असंउ. ४५ ) रास्ना.
**उत्पलसारिवा** ( ड. ) **सर्पसुगन्धा** (ड.सुउ.२६.४०) अनंतमूळ.
**नाकुली** ( ध. ४.१०५ ) मुंगुसवेल.

**–सुगन्धि**–पु., योग० चंदनागरुकुष्ठतगरतिलपर्णिकादिसिद्धोऽयं, सर्वविषे उपयुक्तः ( सुक. १.७५-७७; सुक. ६.१४-२७ )
चंदन, अगुरू, तगर इत्यादींनी युक्त सर्व विषांवर उपयोगी औषधियोग.

**–सुषिर**–पु., दन्तरोग० सुषिरे वर्तमानः शोफः संनिपातज्वरयुक्तः सपूयरुधिरस्रावी विश्लिष्टदन्तबन्धनो नाम्ना महासुषिर इत्युक्तः(असंउ.२५)
दन्तरोग. सुषिर या रोगातील सूज त्रिदोषज ज्वर युक्त होते. हिरड्या झरतात पुवासह रक्तस्राव होतो, तेव्हा त्याला महासुषिर म्हणतात.

**–सेना**–स्त्री., ग्रहमातृ० ( असंउ. ४ )
ग्रहमातृका, एक ग्रह.

**–सोम**–सोम० ( सुचि. २९.६ ) द्र० 'सोम'
सोम महौषधि.

**–स्कन्ध**–वि., उक्ताङ्गुलिप्रमाणात्किञ्चिदधिकस्कन्धयुक्तः महास्कन्धत्वमिदं दीर्घायुर्लक्षणानामेकतमं ज्ञेयम् ( सुसू. ३.५४ )
मोठे खांदे असणारा. शास्त्रात सांगितलेल्या प्रमाणापेक्षा किंचित अधिक मोठे खांदे असणे. दीर्घायुष्याचे एक लक्षण.

**(–स्कन्धा)**–स्त्री., वनस्पती० जम्बूः (ध. ५.८३)
जांभूळ.

**–स्तनाग्र**–वि., विशालस्तनाग्रः (सुसू. ३५.४)
स्तनाची बोंडी मोठी असलेला.

**–स्नेह**–पु., स्नेहचतुष्टयम्, भूरिस्नेहवद्द्रव्यम्, घृततैलवसामज्जाख्याश्चत्वारो महास्नेहाः (चसू. १.७५; अहसू. १६.४)
**चार स्नेह**—तूप, तेल, वसा, मज्जा मिळून. पुष्कळ स्नेहयुक्त द्रव्य. म्हणून हे महास्नेह होत.

**–स्फिच्**–वि., महती स्फिक् कटिपश्चाद्भागो यस्य सः (शुक्रसारपुरुषः) (चवि. ८.१०९)
मोठे कुले असणारा. शुक्रसार पुरुषाचे मोठे असतात.

**–स्रोतस्**–न., शारीर० कोष्ठः ( चवि. ५.८ )
महास्रोतस, कोष्ठ, तोंडापासून गुदापर्यंतचा मार्ग.

**–स्वेद**–पु., लक्षण० अतिस्वेदः (अंसंनि. २.२४)
अती घाम येणे.

**–हिक्का**–स्त्री., रोग० हिक्काभेदः, तत्संप्राप्तिः–अनिलः सकफः प्राणोदकान्नवाहीनि स्रोतांसि मर्माणि संरुध्य हिक्कां करोति। तल्लक्षणानि–उच्चैर्घोषवतीं भृशं हिक्कां करोति। ऊष्माणं संरुध्य संज्ञां मुष्णाति, स्तम्भं जनयति, अन्नपानानां मार्गं रुणद्धि, उपहतस्मृतिः, साश्रुविप्लुतनेत्रः, स्तब्धशङ्खच्युतभ्रूसक्तजल्पप्रलायः, अशान्तचित्तः ( चचि. १७.२२-२६ ) वेगेन देहमायम्य घोषयति सर्वगात्रप्रकम्पिनी अतितृषाकरी च (सुउ. ५०.१४)

सा महामूला, महावेगा, महाशब्दा, महाबला, सद्यःप्राणहरा च विद्यते ( चचि. १७.२६ ) द्र० 'हिक्का'

महाहिक्का, मोठी उचकी. कफासह वात, प्राण, उदक, अन्नवाही स्रोतसे व मर्मे यांचा अवरोध करुन हिक्का करतो. लक्षण–मोठ्याने आवाज निघणारी, अतिप्रमाणात उचकी करतो. अन्नपानाचा मार्ग बंद करतो, स्मृति जाते, अश्रूंने डोळे डबडबतात, कानशीळ जखडते, भुवया पडतात, अडखळत बोलतो, बडबडतो, मनाने अशांत असतो, वेगाने शरीर ताणून आवाज करतो, सर्व अवयवांना कंप येतो अतिशय तहान लागते. तिची कारणे वेग, शब्द व सामर्थ्य ही फार मोठी असतात. ती ताबडतोब मारते.

**महागद्**–पु., योग० त्रिवृत्‌विशल्यामधुकहरिद्रादिसिद्धोऽयं विषघ्नः ( सुक.५.६१-६३ )

महागद नावाचे सिद्ध औषध. ते औषध तेड, कळलावी, ज्येष्ठमध, इत्यादीयुक्त असे विषघ्न आहे.

**महाङ्ग**–पु., वनस्पति० गोक्षुरः ( रा. ३.१३० ) गोखरू.

चित्रकः ( रा. ६.१२७ ) चित्रक.

**महात्मन्**–वि., राजसदृशः महापुरुषः (सुसू. ४६.५३२) मोठे लोक, राजासारखा मोठा मनुष्य.

**महात्यय**–वि., गम्भीरः ( ड. सुउ. ३९.१२४ ) अति नाशकर.

**महात्ययिकत्व**–न., शीघ्रविनाशकारित्वम् (सुनि. ६.८) लवकर नाश करण्याचा धर्म.

**महाद्रि**–पु., वनस्पति० आरग्वधः (रा.९.३३४) बाहवा.

**महानन्दा**–स्त्री., आसुत० सुरा ( रा.१४.२०३-२५४ ) दारू ( एक प्रकार ).

वनस्पति० आरामशीतला ( रापरि. १०.५२ ) अति सुगंधी फुलांची वनस्पती.

**महानस**–न., पाकशाला रसवती इति लोके, ( सुसू. ४६.४५३ ) तच्च आप्तैराश्रितमसंकटं शुचि स्यात् । तत्राऽऽप्तैर्गुणसंपन्नं, भक्ष्यं, सुसंस्कृतमन्नं सुसंगुप्तं शुचौ देशे स्थापयेत् । तच्च प्रशस्तदिग्देशकृतं, शुचिभाण्डं, महच्छुचि, सजालकं, गवाक्षाढ्यमाप्तवर्गनिषेवितं, सवितानं, विकक्षसृष्टसंसृष्टं, कृतार्चनं. परीक्षितस्त्रीपुरुषं भवेत्

(सुक. १.१२-१३) तत्र कुलीनधार्मिकत्वादिभिर्युक्तं, वैद्यगुणान्वितमध्यक्षं नियुञ्जीत ( सुक. १.१४ )

स्वैपाकघर, पाकशाळा, रसवती, आप्तांनी युक्त, संकुचित नसलेले पवित्र असावे. अन्न चांगल्या दर्जाचे असलेले, चांगली फोडणी इत्यादी संस्कार केलेले, स्वादिष्ट चांगले झाकलेले अन्न पवित्र जागी असावे. तसेच योग्य 'दिशेला प्रशस्त जागेत पवित्र व स्वच्छ भांड्यांनी युक्त मोठे पवित्र, जाळीच्या खिडक्यांनी युक्त आप्तांची देखरेख असलेले, छताने युक्त, जवळपास गवताची वाढ व संचय नसलेले, ज्यात अग्निपूजा होत असते असे व विश्वासु असल्याची खात्री असलेल्या स्त्री-पुरुषांनी युक्त असे स्वयंपाकघर असावे. पाकशाळेचा मुख्य व्यवस्थापक कुलीन, धार्मिक इत्यादी गुणांनी युक्त व वैद्यगुणांनी युक्त असा नेमावा.

**महाभिष्यन्दिन्**–वि., अतीवाभिष्यन्दकारी, तद्यथा– ये मृगाश्च विहङ्गाश्चाऽतीवाऽऽसन्ननिलया ग्रामासन्नगृहाः समीपोदकगोचराश्च ते (सुसू. ४६.९२) मांसामुळे अतीशय चिकट स्राव निर्माण करणारे जे पशु-पक्षी–पाळलेले बांधलेले, गांवाजवळ असलेले, जलाशयाच्या काठी संचार करणारे ते.

**महाभ्रसत्व**–न., पारदयोग० कृष्णाभ्रकधान्याभ्रभृङ्गाम्बुतुत्थकपारदादिसिद्धमिदं अखिलार्तिनुत् ( र. २७.६७-७० )

महाभ्रसत्त्व. या नांवाचे सिद्धौषध. काळ्या अभ्रकाचे धान्याभ्र, माका, मोरचूद इत्यादी युक्त. सर्व वेदना नाशक औषध.

**महामय**–पु., महारोगाः ते च वातव्याध्यश्मरीकुष्ठप्रमेहादयोऽष्टौ ( र. १९.९-१३ )

आठ मोठे रोग. वातरोग, अश्मरी, कुष्ठ, प्रमेह इ०

**महामोद**–पु., वनस्पति० कुन्दः ( रा. १०.२५६ ) सुगंधी पुष्प.

**महारम्भ**–वि., महद्भिर्बलवद्भिः पूर्वरूपरूपैर्युक्तः ( अरु ) तीव्रसंरम्भः ( हे. अहृसू. १२.५८ )

थोड्याशा कारणाने उग्र स्वरूपात सुरु होणारा (रोग).

न., लवण० साम्भरलवणम् ( रा.६.४७ ) सांबरलोण.

**महारिष्ट**–पु., वनस्पति० महानिम्बः ( रा. ९.४८ ) मोठा निंब, बकाणा.

**महार्ह**–न., वनस्पति० चन्दनम् ( ध. ३.१ ) चंदन.

**महावरोह**–पु., वनस्पति० प्लक्षः ( रा. ११.१२६ ) नांदरुख, पिंपरी.

**महाशना**–स्त्री., वनस्पति० महाशतावरी (रा. ४.४४२) मोठी शतावरी.

**महाहव**–पु., महासंग्रामः (इन्दु. असंउ. ७) मोठे युद्ध.

**महाहिगन्धा**–स्त्री., वनस्पति० नाकुली ( रा. ७.१५४ ) मुंगुसवेल.

**महिला**–स्त्री., वनस्पति० रेणुका ( रा. ६.९९ ) रेणुकबीज.

**महिष**–पु., पशु० महामृगजातीयाऽऽनूपपशुः (चसू. २७.३९) **तन्मांसगुणाः–तिक्तं, मधुरमुष्णं, स्निग्धं, गुरु, निद्राकरं, शुक्लं, बल्यं, तर्पणं, वृष्यं मांसदार्ढ्यकरं, पित्तघ्नम्** ( ध. ६.४०१ ) **स्तन्य वर्धनम्** ( सुसू. ४६.९८ )
रेडा. टोणगा. मांसाचे **गुण**– कडु, मधुर, उष्ण, पचनास जड, निद्राकर, शुक्रवर्धक, बलकारक, तृप्तिकारक, पौष्टिक, मांस दृढ करणारे, पित्तनाशक, स्त्रियांना दूध वाढविणारी.
**शालिवर्गे एकः, द्र० 'शालि'** ( सुसू. ४६.४ ) साळीचा एक प्रकार.

**–प्लीहन्**–पु., भैषज्य० **भक्षणादिकर्मद्वारा नेत्ररोगेषूपयुज्यते** ( असंउ. १६ )
म्हशीची प्लीहा. खाणे इत्यादी उपयोगाने नेत्र रोगात हितावह.

**–यकृत्**–न., भैषज्य० **भक्षणादिकर्मद्वारा नेत्ररोगेषूपयुज्यते** ( असंउ. १३ )
म्हशीचे यकृत. खाणे इत्यादींनी डोळ्याचे रोगात उपयुक्त.

**–वल्ली**–स्त्री., वनस्पति० **सौम्या** ( रापरि. ३.३० )
सोम जातीची एक वनस्पती. पाने नसलेली कांड व कांड शाखांची वनस्पती.

**–वसा**–स्त्री., भैषज्य० **आनूपमृगवसानामहिततमा** ( चसू. २५.३९ )
म्हशीची चरबी ही वनस्पती व जल भूयिष्ठ देशातील प्राण्याच्या चरबी पेक्षा अहित कारक असते.

**–शालि**–स्त्री., शालि० **द्र० 'शालि'** ( अहसू. ६.२ ) मोठी साळ.

**महिषाक्ष**–पु., निर्यास० **गुग्गुलुः** ( ध. ३.१२७ ) म्हशागुग्गुळ.

**महिषाक्षक**–पु., निर्यास० **गुग्गुलुः** ( रा. १२.१८४ ) म्हशागुग्गुळ.

**महिषाक्रान्ता**–स्त्री., वनस्पति० **आस्फोतोऽर्कः** ( इन्दु. असंउ. ४४ ) गुग्गुळ.

**महिषामिष**–न., महिषमांसम् द्र० ' महिष ' ( अहसू. ८.४० ) म्हशीचे मांस.

**महिषासुरसंभव**–पु., भूमिजः गुग्गुलुभेदः, द्र० ' गुग्गुलु ' ( रा. १२.१८८ ) गुग्गुळ प्रकार.

**महिषी**–स्त्री., ( चसू. १.९३ ) म्हैस.

**–कन्द**–पु., वनस्पति० **शुभ्रालुः** ( रापरि. ७.३३ ) पांढरे अळु.

**–क्षीर**–न., दुग्ध० **महिषीदुग्धं, स्वप्नजनननानां श्रेष्ठम्** ( चसू. २५.४० )
म्हशीचे दूध. झोप आणणाऱ्या औषधात श्रेष्ठ.

**–घृत**–न., घृत० **तद्गुणाः–मधुरं, सुशीतं, गुरु, कफकरं, बल्यं, वर्ण्यं, दीपनं, चक्षुष्यं, वातपित्तघ्नं, रक्तपित्तार्शोग्रहणीनाशकम्** ( ध. ६. १४७ )
म्हशीचे तूप––मधुर, शीत, गुरु, कफकर, धैर्यकर, बलकर, बर्ण सुधारणारे, अग्निदीपक, डोळ्यांना हितकारक, वातपित्तशामक, रक्तपित्त-अर्श-ग्रहणी नाशकर.

**–दधि**–न., दधि० **तद्गुणाः–मधुरं, स्निग्धं श्लेष्मकृद्बल्यं, वृष्यं, शोधनं, रक्तपित्तश्रमनाशनम्** ( ध. ६.१९३ )
म्हशीचे दही. गोड, स्निग्ध, कफवर्धक, बल्य, पुष्टिकर, शोधक, रक्तपित्तश्रमनाशक आहे.

**–दुग्ध**–न., दुग्ध० **तद्गुणाः–मधुरं, शीतं, स्निग्धतरं, गुरु, वह्निनाशनं, निद्राकरं, बलकरं, पुष्टिदं, वृष्यं, पित्तघ्नं, दाहरक्तविकारघ्नम्** ( चसू. २७.२१९ )
म्हशीचे दूध. गोड, थंड, अधिक स्निग्ध, जड, अग्नि नाशक, झोप आणणारे, बलकारक, पुष्टिदायक. शुक्राला हितकर, पित्तघ्न, दाह, रक्तविकारनाशक,

**–पयस्**–न., दुग्ध० **महिषीदुग्धम्** (चसू. २७.२१९; ध. ६.१७०) म्हशीचे दूध.

**–प्रिया**–स्त्री., वनस्पति० **शूली** ( रापरि. ८.६८ )
शूलाच्या आकाराच्या पत्राची शाखा नसलेली, धुरकट मुळाची, पाण्याच्या आश्रयाने होणारी मऊ व बुळबुळीत वेल.

**–मूत्र**–न., मूत्र० **तद्गुणाः-कटूष्णम्, अर्शोदरशूलकुष्ठमेहाऽऽनाहशोफगुल्मपाण्डुवक्षिदोषकण्डूतिनाशनम्** ( ध., ६.४९२ )
महिषीमूत्र. तिखट, उष्ण, अर्श, उदर, शूल, कुष्ठ, मेह, मलबद्धता, सूज, गुल्म, पांडु, डोळ्याचे दोष, कंडूनाशक आहे,

**मही**–स्त्री., वनस्पति० कटुकी ( र. २९.८९-९२ )
कुटकी.
**–कदम्ब**–पु., वनस्पति० मुण्डी ( सुउ. ४१.४७ )
मुंडी.
अलम्बुषा ( ड. सुचि. १७.१५ ) लाजाळू.
भूकदम्ब ( ड. सुचि. १७.१५ ) भुईकळंब.
**–ज**–न., वनस्पति० आर्द्रकम् ( ध. २.८४ )
आले, सुंठ.
**–सह**–पु., वनस्पति० सागः ( रापरि. ९.६ ) साग.

**महेन्द्र**–पु., पर्वत० अत्र ' चन्द्रमा ' सोमविशेष उपलभ्यते ( सुचि. २९.२७; अहृसू. ५.११ )
महेन्द्र पर्वत. यावर विशिष्ट प्रकारची सोमवनस्पती सापडते.

**महेन्द्रकन्या**–स्त्री., वनस्पति० इन्द्रवारुणी ( र. २४.१३९ ) इंद्रावण.

**महेन्द्रवारुणी**–स्त्री., वनस्पति० इन्द्रवारुणी ( रा. ३.३७५ ) इंद्रावण.

**महेश्वरकोपप्रभव** वि., रुद्रकोपसंजातः ( ज्वरः ) ( चनि. १.३५ )
शंकराच्या संतापापासून झालेला ताप.

**महेरणा**–स्त्री., वनस्पति० सल्लकी (ध. ३.१३५) साळई.

**महेश्वरबीज**–न., खनिज० पारदः (र. १६.६९) पारा.

**महेश्वरी**–स्त्री., कृत्रिमधातु० पित्तलम् ( ध. ६.१९ )
पितळ.

**महैरण्ड**–पु., वनस्पति० स्थूलैरण्डः द्र० ' एरण्ड ' ( रा. ८.४४९ ) मोठा एरण्ड.

**महैला**–स्त्री., वनस्पति० भद्रैला द्र० 'एला' (रा. ६.७०)
मोठी वेलची.

**महोटिका**–स्त्री., वनस्पति० वृन्ताकी ( रा. ७.१२७ )
वांगे.
बृहती ( ध. १.९३ ) डोरली रिंगणी.

**महोत्पल**–न., वनस्पति० कमलम् ( रा. १०.२४४ )
कमळ.

**महोत्सव**–पु., शक्रोत्सवादिः ( सुसू. २.१० )
मोठा उत्सव.

**महोदयप्रत्ययसार**–पु., पारदयोग० रसगंधकाभ्रताम्रादिसाधितोऽयं सर्वरोगहरः ( र. १५.४४-५२ )
पारा, गंधक, ताम्रयुक्त. सर्व रोगहर औषधाचे नाव.

**महोदया**–स्त्री., वनस्पति० बलामोटा ( रा. ४.४२७ )
सूक्ष्ममुळांची हिरवी वनस्पती.

**महोदर**–न., रोग० जलोदरम् द्र० 'उदर' (र. २.१२२)
जलोदर.

**महोदरत्व**–न., लक्षण० दुष्प्रजातायाः सूतिकारोगः चतुःषष्टिसूतिकारोगेष्वेकः ( काखिल. ११.७-१४ )
सूतिकारोग. ६४ सूतिकारोगांपैकी एक.

**महर्षभी**–स्त्री., वनस्पति० कपिकच्छूः (ध. १.१५१)
खाजकुहिली.

**महर्षिसंघ**–पु., महर्षीणां समुदायः ( चसि. ३.३ )
महर्षींचा समुदाय.

**महौजसी**–स्त्री., वनस्पति० तेजोवती (ध. १.२६६)
मालकांगोणी.

**महौदनी**–स्त्री., वनस्पति० शतावरी (रा. ४.४३९)
शतावरी.

**महौषध**–न., वनस्पति० भूम्याहुल्यम् (रापरि. ४.३६)
भुईतरवड.
वत्सनाभः (ध.७. १२८) बचनाग.
लशुनः (ध. ४.६६) लसूण.
शुण्ठी (चसू. ४.१२; सुसू. ४४.७–८; ध. २.८२)
सुंठ.
अञ्जनम् (सुउ. ९.२३) अंजन, सुरमा.

**(महौषधी)**–स्त्री., वनस्पति० नीलदूर्वा, द्र० 'दूर्वा' ( रा. ८.२२७ ) दूर्वा.
कटुका (रा. ६.५५) कुटकी.
अतिविषा (रा. ६.७) अतिविष.
लक्ष्मणा (ध. १.९७) पाढरी रिंगणी.
ब्राह्मी (ध. ४.१००) ब्राह्मी.

**महौषधि**–स्त्री., वनस्पति० वाराहीकन्दः (रा. ७.१३६)
वाराहीकन्द, डुक्कर कंद.
**सोमसमवीर्या महौषधिः, ता एता महौषधयः– श्वेतकापोती, कृष्णकापोती, गोनसी, वाराही, अजगरी, कन्या, छत्राऽतिछत्रा, करेणुरजा, चक्रकाऽऽदित्यपर्णिनी, ब्रह्मसुवर्चला, श्रावणी, महाश्रावणी, गोलोमी, अजलोमी, महावेगवती; तासां सोमवत्क्रियाशीःस्तुतयः शास्त्रेऽभिहिताः** ( सुचि. ३०.५ ) **' महेन्द्ररामकृष्णानां ब्राह्मणानां गवामपि । तपसा तेजसा वाऽपि प्रशाम्यध्वं शिवाय वै ॥ ' इत्यनेन मन्त्रेण महौषधीनामुद्धरणं करणीयम्** ( सुचि. ३०.२७ )
सोम नांवाच्या रसायनात सांगितलेल्या औषधि प्रमाणे (१) श्वेतकपोती (२) कृष्णकपोती (३) गोनसी (४) वाराही (५) अजगरी (६) कन्या (७) छत्रा

(८) अतिछत्रा (९) करेणु (१०) अजा (११) चक्रका (१२) आदित्यपर्णी (१३) ब्रह्मसुवर्चला (१४) श्रावणी (१५) श्रावणी (१६) गोलोमी (१७) अजलोमी (१८) महावेगवती ही अठरा औषधे सोम समान शक्तिशाली आहेत. वरील मंत्राने मोठ्या औषधी काढाव्यात.

**मांस**–न., धातु० **सप्तधातुष्वेकम्** (असंसू. १.३१) **दशप्राणायतनेष्वेकम्** (चशा. ७.९) **मांसवहानां स्रोतसां मूलं स्नायुस्त्वक् च** (चवि. ५.८) **मांसधराकलायामधिष्ठिते मांसे सिरादीनां प्रताना भवन्ति** (सुशा. ४.८) **रक्तस्य सारांशात् मांसस्य उत्पत्तिः**, (असंशा. ६.६६) **मांसवहस्रोतस्सु मांसधात्वग्निना मांसोत्पत्तिर्भवति** (चचि. १५.१६) **रसोत्पत्त्यनन्तरं तृतीयेऽहनि मांसोत्पत्तिः इति केचित्, दशमेऽहनि इति च अपरे** (सुसू. १४.१४; चचि. १५.२९) **पिच्छिलं घनं श्लक्ष्णमीषद् रक्तमिति मांसस्य स्वरूपम्। मांससारः पुरुषः अच्छिद्रगात्रो गूढास्थिसन्धिर्मांसोपचितः, शङ्खललाटकृकाटिकाक्षिगण्डहनुग्रीवास्कन्धोदरकक्षवक्षःपाणिपादसंधयः स्थिरगुरुशुभमांसोपचिता मांससाराणाम्** (चवि. ८.१०५; सुसू. ३५.१६) **मांस-कर्म-मांसं शरीरपुष्टिं करोति** (सुसू. १५.५(१)) **लेपनं मांसस्य श्रेष्ठं कर्म** (अहसू. ११.४) **मांसाद् वसा तथा षट् त्वच इत्युपधातवः संभवन्ति। शरीरच्छिद्रेषु मलः– खमल इति संज्ञितो मांसधातोर्मलः** (चचि. १५.१७; सुसू. ४६.५२९) **मांसावयवः संघातः परस्परं विभक्तः पेशी इत्युच्यते** (ड. सुशा. ५.३९) **मांसक्षयलक्षणम्–इन्द्रियदौर्बल्यं गण्डस्फिक्शुष्कता सन्धिषु वेदनाश्च मांसक्षये भवन्ति** (अहसू.११.१८) **दधिसिद्धान्यम्लानिषाडवकानि स्थूलक्रव्यादमांसानि मांसक्षीणोऽभिकांक्षति** (ड. सुसू. १५.२९) **मांसवृद्धिलक्षणम्–गण्डार्बुदग्रन्थिगण्डोरूदरवृद्धिता कण्ठेष्वधिमांसं च मांसवृद्धौ भवन्ति** (अहसू. ११.१०) **अधिमांसार्बुदं कीलं, गलशालूकशुण्डिके पूतिमांसालजी–गण्डगण्डमालोपजिह्विकाः इति मांसाश्रयान् मांसप्रदोषजान् विकारान् विद्यात्** (चसू. २८.१३-१५) **मांसजविकारेषु संशोधनं शस्त्रक्षाराग्निकर्म च कर्तव्यम्** (अहसू. ११.३०)

मांस. सातधातूपैकी एक धातु. दहा प्राणायतनापैकी एक. मांसवह स्रोतसांचे मूळ स्नायु व त्वचा होय. मांसधराकलेमध्ये असलेल्या मांसातच शिरा आदींचे बारीक तंतु असतात. रक्ताच्या सार भागापासून मांसाची उत्पत्ति होते. मांसवह स्रोतसांमध्ये धातूच्या अग्नीकडून मांसाची उत्पत्ति होते. काही तज्ञांचे मते तीन दिवसात व कांहींच्या मते दहाव्या दिवशी मांसउत्पत्ति होते. बुळबुळीत, घट्ट, गुळगुळीत, किंचित लालसर असे मांसाचे स्वरूप आहे. मांससार माणसाचे सर्व अवयव छिद्रविरहित, चांगले परिपुष्ट व दिसावयास सुरेख असे असतात. कानशीळ, कपाळ, घाटीचा भाग, डोळे, गाल, हनुवटी, मान, खांदे, पोट, काख, छाती, हातापायांचे संधि हे सर्व स्थिर, मजबूत, सुंदर, मांसाने भरदार असे असतात. मांसाचे कर्म– शरीर पुष्ट व अवयवांवर लेप करणे. एकमेकापासून अलग दिसणाऱ्या मांसाच्या घट्ट भागांना पेशी म्हणतात. मांसापासून वसा व सहा त्वचा हे उपधातु उत्पन्न होतात. शरिरावरील रोमरंध्रांतून जाणारा मळ हा मांस धातूचा मल. आहे. **मांसक्षयलक्षणे**— इंद्रियांची दुर्बलता; गाल, कुल्ले ही वाळतात. सांध्यामध्ये वेदना होतात. मांसक्षय झालेले लोक दह्यापासून बनविलेले आंबट पदार्थ, कोशिंबिरी, मांसावर जगणाऱ्या हिंस्र लठ्ठ पशूंचे मांस यांची अपेक्षा करतात. **मांसवृद्धि लक्षणे**—फोड, गाठी, अर्बुद उत्पन्न होणे, गाल, पोट, कुल्ले, मांड्या व गळा या ठिकाणी मांसवृद्धि दिसते. अधिक मांस वृद्धीमुळे अर्बुद, कील, गलशालुक, गलशुण्डिका पूतिमांस अलजी, गण्ड, गण्डमाला, उपजिव्हिका इत्यादी विकार होतात. मांसापासून झालेल्या विकारावर वमन विरेचनादी शरीरशुद्धीचे उपाय शस्त्रकर्म, क्षारकर्म, व डाग देणे अशा स्वरूपाचे उपचार करावे.

**प्राणिजद्रव्य० अन्नद्रव्य० प्राणिनां मांसमन्नद्रव्यत्वेनोपयुज्यते; अष्टधा मांसं–मृगविष्किरप्रतुदबिलेशय-प्रसह-महामृग-जलचर-मत्स्यभेदेन** (हे. अहसू. ६.४३) **मांसं बृंहणीयानां श्रेष्ठम्** (चसू. २५.४०) **मध्यमे वयसि स्थितस्य पश्वादेः मांसं श्रेष्ठम्** (सुसू. ४६.३३६-३९) **मांसपरीक्षायां प्राणिनः चरो नाम भक्ष्यं विहारश्च, शरीरावयवाः स्वभावो धातवः क्रियाः लिङ्गं प्रमाणं संस्कारः मात्रा च परीक्ष्यंते** (सुसू. ४६.१३८) **फलाशिनां विहङ्गानां मांसम् अतीव रूक्षं, पिशिताशिनां तु**

अत्यर्थं बृंहणं, मत्स्याशिनां पित्तकरं, धन्वचारिणां वातघ्नम् अभक्ष्यमांसं-मृतं कृशमतिमेदुरं वृद्धं बालं विषहतमगोचरभृतं सर्पव्याघ्रादिभिः सूदितं मांसं न भक्षणीयम्, अस्माद् विपरीतं दोषरहितं मांसं बृंहणं बलवर्धनं च ( चसू. २७.३११-१२ )

प्राणिज द्रव्य, अन्न द्रव्य आहे. प्राण्यांचे मुख्य अन्न म्हणून मांसाचा उपयोग केलेला जातो. मांस आठ प्रकारच्या प्राण्यांचे वापरले जाते. मृग, विष्किर, प्रतुद, बिलेशय, प्रसह, महामृग, जलचर, मत्स्य. मांस हे बृंहण क्रियेत श्रेष्ठ आहे. मध्यम वयाच्या प्राण्याचे मांस श्रेष्ठ आहे. मांस परीक्षेमध्ये प्राण्याचा आहार, शरिराचे अवयव, स्वभाव, धातु, क्रिया, लिंग, प्रमाण, संस्कार, व मात्रा यांचा विचार केला जातो. उदाहरणार्थ–फळे खाणाऱ्या व आकाशात उडणाऱ्या पक्ष्याचे मांस अतीशय रूक्ष आहे. दुसऱ्या प्राण्यांचे मांस खाणाऱ्या प्राण्यांचे मांस अत्यंत बृंहण आहे. मासे खाणाऱ्यांचे मांस पित्तकर आहे. निर्जल देशांत फिरणाऱ्या प्राण्यांचे मांस वातनाशक आहे. **अभक्ष्यमांस**—मेलेल्या प्राण्याचे, कृशप्राण्याचे, अति मेदस्वी प्राण्याचे, म्हाताऱ्याचे, अतीशय लहानाचे, विषबाधा झालेल्याचे, सर्प व्याघ्रादिकांकडून मारलेल्यांचे मांस खाऊं नये. या खेरीज विपरीत गुणांचे व दोषरहित मांस पौष्टिक व बलवर्धक होय.

**–कच्छप**–पु., रोग० कच्छपरोगः ( सुनि. १६.४०-४३ )
मांसदुष्टीमुळे टाळूवर कासवासारखी सूज उत्पन्न होते असा रोग.

**–कन्दी**–स्त्री., मांसाङ्कुरः ( सुसू. ५.१५ )
मांसाकुर.

**–कृद्वर्ग**–पु., भैषज्य० मञ्जिष्ठा-सैन्धव-क्षौद्रनागदन्ती–त्रिवृत्–तिलाः, रसाञ्जनं द्विरजनी तेजोह्वा निम्बपल्लवाः । अयं वर्गः भगन्दरे उपयुक्तः ( असंउ. ३२ )
मांसवृद्धि करणारा वर्ग. मंजिष्ठा सैंधव मध नागदंती तेड तीळ रसांजन दोन्ही हळदी मालकांगोणी निंबाची पाने हा भगंदरात उपयुक्त.

**–कोथ**–पु., लक्षण० मांसस्य पूतीभावः ( सुसू. २५.३-५ ) मांस कुजणे.

**–क्लेदः**–पु., रोग० मांसस्य क्लेदनं, चत्वारिंशत्पित्तविकारेष्वेकः ( चसू. २०.१४ )
मांसाला ओलावा येणे. ४० पित्तरोगांपैकी एक.

**–क्षय**–पु., लक्षण० मांसस्याऽपचयः ( सुसू.३३.५ )
मांस क्षीण होणे.

**–गुटिका**–स्त्री., कल्प० एषा शुक्रवर्धनी ( चचि. २.(४) ११-१४ )
औषधाचे नाव. हे शुक्रवर्धक आहे.

**–चक्षुस्**–न.,चर्मचक्षुः ( का. भोजनकल्प )
मांसघटित डोळे. स्थूल असे शरिराला असणारे डोळे.

**–च्छेद**–पु., लक्षण० मांसस्य च्छेदनम् ( अहृसू. २९.४६ ) मांसच्छेदन, मांस कापणे.

**–जाल**–न., मांसस्य, मांसकृतं वा जालम् मांसजालानि चत्वारि–तान्येकैकस्मिन् मणिबन्धे गुल्फे च संश्रितानि ( सुशा. ५.१२ )
मांसाचे किंवा मांसाने केलेले जाळे, शरिरात ही चार आहेत. एकेका मनगटात व घोट्यात एक एक मिळून ४ आहे.

**–तान**–पु., रोग० गलरोग० प्रतानवान् लम्बनशीलः श्वयथुः क्रमेण गलोपरोधं कुरुते; अयं सुकष्टः प्राणप्रणुत् सर्वदोषजो विकारः ( सुनि. १६.६२ )
गलरोगाचे नाव. हा अतिकष्टाने बरा होतो. प्राणघातक. हा तिन्ही दोषांच्या दुष्टीने होतो. ताणे असलेली लांबत जाणारी सूज क्रमाने गळा बंद करते.

**–तोय**–न., मांसधावनोदकम् ( सुउ. ४०.१० )
मांस धुतल्याने निघणारे पाणी.

**–दग्ध**–पु., रोग० अग्निदग्धे अवस्था० लक्षणम् कपोतवर्णत्वमल्पशोफरुजता शुष्कसंकुचितव्रणता च ( असंसू. ४.६ )
विस्तवाने भाजल्याची अवस्था. येथे पारव्याच्या रंगासारखा रंग, थोडी सूज व वेदना, सुकलेला व संकुचित व्रण ही लक्षणे दिसतात.

**–दरण**–पु., रोग० मांसस्याऽवदरणं शीर्णतेति यावत् । चत्वारिंशत्–पित्तविकारेष्वेकः ( असंसू. २०.१४ )
मांस गळणे, चाळीस पित्तरोगांतील एक.

**–दाह**–पु., उपक्रम० मांसस्य दहनम् ( अहृसू. ३०.४३ )
मांसस्थानी डाग देणे, एक उपचार.

**–द्राविन्**–पु., वनस्पति० अम्लवेतसः ( रा. ६.१४८ ) अम्लवेतस.

**–धरा**–स्त्री., शारीर० सप्तसु कलास्वेका, सप्तानां कलानां प्रथमा मांसधरा नाम, यस्यां मांसे सिरा-

**स्नायु धमनी स्रोतसां प्रताना भवन्ति** (सुशा. ४.८)
मांसधरा कला. सात कलांपैकी एक. पहिली मांसधरा. जिच्या-मांसात शिरा स्नायु धमनी स्रोतसांच्या शाखा-ताणे ( तंतु ) असतात.

**सप्तसु त्वक्ष्वेका सप्तमी मांसधरा नाम व्रीहिद्वय-प्रमाणा भगन्दरविद्रध्यर्शोऽधिष्ठाना** ( सुशा. ४.४ )
मांसधरा त्वचा. सात त्वचांपैकी-सातवी मांसधरा. दोन तांदुळ प्रमाणाची जाडी, भगंदर, विद्रधि, मूळव्याध यांचे अधिष्ठान.

**-धावन**-न., **मांसप्रक्षालनोदकम्** ( चचि. १९.९ )
मांस धुतलेले पाणी, मांसाचे धुवण.

**-पाक**-पु., **रोग० चत्वारिंशत् पित्तविकारेष्वेकः** ( कासू. २७.१९-३५ )
मांसपाक ४० पित्तविकारांतील एक.
**शूकदोषजरोगेष्वेकं लक्षणम्-मांसानि-शीर्यन्ते त्रिदोषजाश्च वेदना भवन्ति** ( सुनि. १४.१४-१५ )
शूकदोष. लिंग मोठे करण्याच्या चुकीच्या उपचारांचे अनिष्ट फळ. मांस गळते व त्रिदोषज वेदना होतात.

**-पुष्पिका**-स्त्री., **वनस्पति० भ्रमरारिः** (रा. १०.४१)
मांसपुष्पिका. भृंगामारी हिच्या फुलातील मध खाऊन भृंगे मरतात.

**-पेशिका**-स्त्री., **मांसपेशी** ( असंसू. ३४.३९ )
मांसाचे आवरण.

**-पेशी**-स्त्री., **मांसवर्तिः** ( सुसू. ९.४ ) **मांसखण्डः** (सुचि. १.१२२) **पेशी 'चत्वारि मांसपेशीशतानि'** ( काशा )
मांसाचा तुकडा. मांसाचे आवरण. चारशे मांसाच्या पेशी आहेत.

**-प्ररोह**-**मांसाङ्कुरः** ( सुनि. २.४ )
मांसाकुर, मांसाचे अंकुर.

**-भेषजकल्क**-पु., **कल्प०** ( अहसू. २४.१७ )
औषधाचे नाव, मांसाच्या औषधाची चटणी.

**-मर्मन्**-न., **शारीर० मर्म० तलहृदयेन्द्रबस्तिगुद-स्तनरोहितानि मांसमर्माणि । तत्र एकादश मांस-मर्माणि, चत्वारि तलहृदयानि, चत्वारि इन्द्रबस्तीनि एकं गुदं, द्वे स्तनरोहिते एवमेकादश** ( सुशा. ६.७) **मांसमर्मविद्धलक्षणम्-स्पर्शं न जानाति, विपाण्डु-वर्णश्च स्यात्** ( सुसू. २५.४० )
मांसमर्मे. अकरा आहेत. नावे वर आहेत. तल-हृदये चार, इंद्रबस्ति चार, गुद एक, स्तनरोहित दोन. मर्माघाताचे लक्षण-स्पर्श न कळणे. पांढुरका वर्ण.

**-माषा**-स्त्री., **वनस्पति० माषपर्णी** ( ध. १.१३६ )
उडदाच्या पानासारखी पाने असणारी वनस्पती. रानउडीद.

**-रज्जु**-स्त्री., **शारीर० मांसनिबन्धनस्नायुः, पेशीनिब-न्धनार्थं प्रयुक्तः । महत्यो मांसरज्जवश्चतस्रः पृष्ठवंशमुभयतः, द्वे बाह्ये द्वे चाभ्यन्तरे** ( सुशा. ५.१४ )
मांसदोरी. मांस निबंधन करणारे स्नायु. मांसाच्या मोठ्या दोऱ्या चार. ह्या पाठीच्या मणक्याच्या दोन्ही बाजूला बाहेरून व आतून अशा आहेत.

**-रस**-पु., **मांसस्य रसः, मांसयूषः, तस्य पाकविधिः -प्रस्थेऽम्भसि पलं मांसं साध्यं, पादस्थितो रसः** ( अहको ) **मांसरसगुणाः—सर्वभूतानां प्रीणनो हृद्यो बहुरोगप्रशमनः स्वर्यो वयोबुद्धीन्द्रियायुर्बलकरो व्यायामस्त्रीमद्यनित्यानां च हितकरः । कृशव्याधि-मुक्त-शुष्क-बलार्थि-वर्णार्थिक्षीणरेतसां च हिता-वहः** ( चसू. २७.३१२-३१५ ) **प्राणजननो वात-पित्तश्रमहरः श्वासकासक्षयापहः स्मृत्योजःस्वर-हीनानां ज्वरक्षीणक्षतोरसां भग्नविश्लिष्टसंधीनां च हितः** ( सुसू. ४६.३५९-६१ )
मांसरस. मांस शिजवून तयार केलेला रस्सा. ६४ तोळे पाण्यात चार तोळे मांस शिजवावे. ¼ भाग द्रव द्रव्य शिल्लक राहीपर्यंत आटवावे. शिल्लक राहि-लेला रस्सा हाच मांसरस होय. **मांसरसगुण**— सर्वांना आवडणारा, हृदयाला हितकर. बरेच रोग नाहीसे करणारा, स्वराला हितकारक, वय-बुद्धि इन्द्रिय-आयुष्य आणि बल निर्माण करणारा, नित्य व्यायाम, स्त्रीचा उपभोग आणि मद्यसेवन करणाऱ्यांना हितकारक, कृश, आजारातून उठलेला, शुष्क आणि बल वर्ण व शुक्र चांगले असावे असे इच्छिणारांना हितावह, प्राणशक्ति वाढविणारा, वात-पित्त-श्रम नाशक, श्वास, खोकला व क्षय नाशक, ज्वराने व शुक्र दोषाने क्षीण लोकाना व हाड मोडले किंवा सांधे ढळले तर उपयुक्त.

**-रुहा**-स्त्री., **वनस्पति० मांसरोहिणी** (रा. १२.१३८)
मांसरोहिणी. पहा 'मांसरोहा'

**-रोहा**-स्त्री., **वनस्पति० मांसरोहिणी** ( ध.. ४.९४ )
लव युक्त वाटोळ्या तांबड्या फुलांची वनस्पती.

**-रोहिका**-स्त्री., **वनस्पति० मांसरोहिणी** ( रा. १२.१३९ ) मांसरोहिणी. पहा 'मांसरोहा.'

**-रोहिणी**-स्त्री., **वनस्पति० गुणाः-कटुस्तिक्ता, कषायोष्णा, ग्राहिणी, वर्ण्या, पित्तघ्नी, स्वरसादरक्तपित्तघ्नी च** ( ध. ४.९४ )
मांसरोहिणी, पहा मांसरोहा.
**गुण**- कडू, तिखट, तुरट, उष्ण, मळ बांधणारी, वर्ण सुधारणारी, बिघडलेला स्वर-पित्त व रक्तपित्त नाशक.

**-रोही**-स्त्री., **वनस्पति० मांसरोहिणी** (रा. १२.१३८) मांसरोहिणी, पहा ' मांसरोहा.'

**-वहस्रोतस्**-न., **शारीर० स्रोतो०मांसवहानां च स्रोतसां स्नायुर्मूलं त्वक् च** (चवि.५.८) **मांसवहे द्वे, तयोर्मूलं स्नायुः, त्वक्, रक्तवहाश्च धमन्यः; तत्रविद्धस्य श्वयथुर्मांसशोषः सिराग्रन्थयो मरणं च** ( सुशा. ९.१२ ) **स्थूलगुर्वभिष्यन्दिभोज्यानि जग्ध्वा निरतिशयं दिवास्वापसुखमनुभवतां मांसवहं स्रोतो दुष्यति** ( चवि. ५.१५ )
मांसवहस्रोतस, मांसवह स्रोतसांचे स्नायु व त्वचा हे मूळ आहे. असे चरक मत आहे. मांसवह स्रोतसे २ आहेत त्यांचे ही मूळ स्नायु, त्वचा आणि रक्तवह धमन्या होत. मांसवह स्रोतसे विद्ध झाली तर सूज, मांस शोष सिराग्रंथी व मरणसुद्धा येते. स्थूल, गुरु, अभिष्यंदी भोजने, दिवसा झोप, सुखाचा अतिरेक यानी मांसवह स्रोतसे बिघडतात.

**-वाहिस्रोतस्**-न., **शारीर० मांसवहं स्रोतः,** ( चवि. ५.१५ ) मांसवह स्रोतस.

**-शात**-पु., **मांसक्षरणम्** ( सुचि. ९.५१ )
मांसक्षरण होणे. मांस झरणे.

**-संघात**-पु., **रोग० तालुगतरोग० तात्वन्तःस्थं मांसं श्लेष्मणा दुष्टं नीरुजं मांससंघात इति व्यपदिष्ट सन्** ( सुनि. १६.४४ ) **मुखरोगेषु मांसोपचयः मांसदोषजविकारेष्वेकः** ( सुसू. २४.९ ) **च्छेद्यरोगोऽयं** ( सुसू. २५.३-५ )
मांसवृद्धि होणारा तालुगत रोग. टाळूच्या आंतले मांस कफाने दुष्ट होऊन वेदना रहित मांसाची वाढ व संचय होतो. हा कापून काढण्यासारखा विकार आहे.

**-संरब्ध**-वि., **मांसोपचितम्** ( सुउ. ६.१२ )
मांस वाढलेले. मांसाने पुष्ट.

**-सात्म्य**-वि., **यस्य मांसं सुखावहं भवति सः। अनुभूयमानमांससात्म्यसुकरम्** (चचि. ३.१९१)
मांस सुखवह होणारे, मांस मानवणे. प्रकृतीला अनुकूल होणे.

**-सार**-पु., **धातुसार० शंख-ललाट-कृकाटिकाऽक्षिगण्डहनुग्रीवास्कन्धोदरकक्षवक्षःपाणिपादसंधयः स्थिरगुरुशुभमांसोपचिता मांससाराणाम्। सा सारता क्षमां धृतिम् अलौल्यम् वित्तं विद्यां सुखमार्जवमारोग्यं बलमायुश्च दीर्घमाचष्टे**
( चवि., ८.१०५ )
मांससार. बलवान—विशुद्धतर मांसघटक असलेला. याचे कानशीळ, कपाळ, डोके, मान, यांचा सांधा; डोळा-गाल-हनुवटी-मान-खांदा-उदर-काख-छाती-हातपाय यांचे संधि स्थिर जड निर्दोष मांसाने पुष्ट असतात. या सारतेने क्षमा, धैर्य, आसक्ति नसणे, धन, विद्या, सुख, सरळपणा, आरोग्य, बळ, व दीर्घायुष्य यांचा लाभ होतो.

**-सिराप्रणाश**-पु., **लक्षण० मांसस्य सिराणां च नाशः** ( सुनि., १०.६ ) मांस व शिरांचा नाश.

**मांसल**-पु., **वनस्पति० मांसलफलः** ( रा. ७.२७१ )
कलिंगड.
**धान्य० माषः** ( ध. ६.९९ ) उडीद.
**बस्तिदोष० अस्मिन् विस्रत्वं भवति** ( चसि. ५.६ )
बस्तिदोष, यात लघ्वीला घाण येते.

**-फल**-पु., **वनस्पति० कलिङ्गः** ( रा. ७.२७१ )
कलिंगड.

**-( फला )**-स्त्री., **वनस्पति० वृन्ताकी** (रा. ७.१२७)
वांगे.

**मांसाङ्कुर**-पु., **लक्षण० मांसस्य प्ररोहः**
( सुसू. ५.१५; **डल्हण** ) मांसाचे अंकुर.

**मांसादमांस**-न., **मांसाशिनः व्याघ्रादेः मांसम्। इदं विशेषतः मांसवर्धनं बृंहणं च** ( असंसू. २४.५९ )
मांस खाणाऱ्या प्राण्याचे मांस. हे विशेषतः मांसवर्धक व पौष्टिक आहे.

**मांसावगाढ**-वि., **मांसान्तर्गतम्** ( सुसू. २७.५ )
मांसात खोल गेलेले.

**मांसार्मन्**-न., **नेत्ररोग० शुक्रवदस्य लेखनाञ्जनाभ्यामुपचारः** ( ड. सुउ. १५.१७ )
नेत्ररोग. नेत्रशुक्र या रोगासारखे खरडून काढणारे औषध व अंजन उपयोगात आणावे.

**मांसावृतवात**–पु., रोग० तस्य लक्षणम्–विवर्णः, कठिनः शोफः तथैव पिटिकाः, हर्षः, पिपीलिका सञ्चारवद्वेदनाविशेषः ( चचि. २८.६४-६५ )
मांसाने आवृत वायु. रोग. लक्षणे. विकृत वर्णाचा, कठीण सूज, तशाच पुळ्या रोमांच, मुंग्या चालत आहेत अशा वेदना.

**मांसिनी**–स्त्री., वनस्पति० जटामांसी ( रा. १२.९० )
जटामांसी.

**मांसी**–स्त्री., वनस्पति० जटामांसी ( चसू. ५.२१; सुसू. ३८.२४; ध. ३.४५ ) जटामांसी.

**मांसोचित**–वि., मांससात्म्यः, अभ्यासात् मांसं सात्म्यं संजातं यस्य, सः ( चचि. ३०.३१६ )
अभ्यासाने मांस खाणे संवयीचे केले आहे ज्याने तो. मांस खाण्याची सवय असलेला.

**मांसोदक**–न., मांसरसस्य अच्छो भागः सौरावाख्यः ( ड. सुउ. ४८.२८ ) मांसरसाचा स्वच्छ द्रव.

**मांसोद्गम**–पु., मांसाङ्कुरः ( सुनि. १६.३७ )
मांसाकुर.

**मांसोन्नति**–स्त्री., रोग० उन्नतमांसम् । अयं रोगविशेषो लेख्यः ( सुउ. २५.९-१० )
मांसाचा उंचवटा हा रोग खरडून काढावयाचा असतो.

**मांसोपचय**–पु., लक्षण० मांससङ्घातः ( सुनि. ११.१३-१४ )
मांसाचा साठा. स्थानिक वृद्धीने मांसाचा संचय.

**मांसोपदंश**–पु., मांसभक्षणे व्यञ्जन० ( सुउ. ४१.३८)
मांसाबरोबरचे तोंडी लावणे.

**मांस्पाक**–पु., गुह्यरोग० सन्निपातजोऽयम् । सर्ववेदनो मेढ्रमांसशातनश्च ( असंउ. ३८.३२० )
गुह्यरोग. हा त्रिदोषज. सर्व तऱ्हेच्या वेदना, शिश्नाचे मांस गळते.

**मा**–स्त्री., वनस्पति० लवङ्गम् ( र. १८.४७-५२ ) लवंग.

**माकन्दः**–पु., वनस्पति० आम्रः ( र. २२.१२६; ध. ५.२ ) आंबा.

**( माकन्दी )**–स्त्री., वनस्पति० तस्याः गुणाः– कटुका, तिक्ता, मधुरा, दीपनी, रुच्याऽल्पवातला पथ्या च ( रा. ७.१५ )
स्वच्छ पुष्कळ सुगंधी मुळाची काळी वनस्पती. तिखट, कडु, गोड, दीपक, रुचकर, थोडी वातूळ, पथ्यकर.

**माकुलि**–पु., सर्प० वैकरञ्जः, कृष्णसर्पेण गोनस्यां जातः । अथवा गोनसेन कृष्णसर्पिण्यां जातः ( सुक. ४.३४ (५) )
सापाचा प्रकार. काळ्या नागापासून घोणसाला अथवा उलट जोडप्याला झालेला.

**माक्षिक**–पु., न., खनिज० उत्पत्तिः तापीकिरातचीनेषु यवनेषु च सुवर्णशैलप्रभवः काञ्चनो रसः विष्णुना विनिर्मितः । सूर्यांशुसन्तप्तस्ताप्यो माधवे मासि दृश्यते । मधुरः अम्लः काञ्चनाभासः रजतसंनिभः । द्विविधो माक्षिकः स्वर्णमाक्षिकस्तारमाक्षिकश्च । तत्र कान्यकुब्जोत्थं स्वर्णमाक्षिकं तापीतीरसम्भूतं पञ्चवर्णं सुवर्णवत् । शोधनम्– तप्तं वराक्काथे क्षिप्तं माक्षिकं शुद्धिमायाति । मारणम्–मातुलुंगाम्लगन्धाभ्यां पिष्टं मूषोदरे स्थितं पञ्चकोलपुटे ध्मातं माक्षिकं म्रियते । गुणाः– कटु, तिक्तं, मधुरम् ( रा. १३.२११ ) उष्णं, रसायनं, वृष्यं, चक्षुष्यं; त्रिदोषशमनं बस्तिरोगार्शःशोफोदरक्षयविषापहम् ( ध. ३.१४८; रा. १३ ) भ्रमहृल्लासमूर्च्छाश्वासकासघ्नम् कफापहं च(रा. १३.२११) माक्षिकधातु–तापीजममृतोपमम् काञ्चनाभासं मधुरं अम्लं वा रजतप्रभं पिबतः जराकुष्ठमेहपाण्ड्वामयक्षयाः नश्यन्ति ( सुचि. १३.१७-१८ ) स्वर्णमाक्षिकं नेत्ररोगे प्रतिसारणार्थमुपयुज्यते ( सुउ. १२.६-८ ) पाण्डुरोगे उपयुक्तम् ( चचि. १६.७३ )
हिं.—सोनामाखी.
**म.—माक्षिक.**
गु.—सोनामखी.
ता.—पौन्निमिळै.
माक्षीक. प्रकार दोन (१) सुवर्णमाक्षीक सोन्यासारखा. (२) तारमाक्षिक (रौप्यमाक्षीक) रुप्यासारखा भासणारा. **गुण**—तिखट, कडु, मधुर, उष्ण, रसायन, शुक्रवर्धक, चक्षुष्य, त्रिदोषशमन, बस्तिरोग, मूळव्याध, सूज, उदर, क्षय, विषनाशक आहे. भ्रम, हृल्लास, मूर्च्छा, श्वास, कास, कुष्ठ, मेह, पांडु, क्षय नाशक असून कफ नाशकही आहे. डोळ्याच्या रोगात प्रतिसारणाकरिता (घासण्याकरिता) उपयुक्त. तापीनदी, आसाम, चीन व यवन देशात सापडतो. चैत्र वैशाखात तापल्यावर दिसतो. कनोज व तापीचे सुवर्णमाक्षिक सोन्यासारखे पण पाच रंगाच्या छटेचे असते. **शुद्धि**—सुवर्णमाक्षिक लाल तापवून त्रिफळेच्या काढ्यात टाकावे. **मारण**—महाळुंगाचा रस

व गंधकात खलून मुशीत सुंठ इ० पंचकोल द्रव्यात घालून फुंकावे. तापीकाठचे सोन्यासारखे चमकणारे माक्षिक सर्वोत्तम. त्याचा रस मधुर. दुसरे चांदीसारखे ते रौप्यमाक्षिक अम्ल रसाचे असून वृद्धत्वाची चिन्हे, कोड, मेह, पांडुरोगनाशक आहे. सुवर्णमाक्षिक नेत्ररोगात प्रतिसारण म्हणून उपयुक्त आहे. मधु ( चसू. २.२५ ) **पिङ्गलवर्णा महत्यो मक्षिकाः तद्भवम्** ( सुसू. ४५.१३३ ) **गुणाः—लघुतरं रूक्षं श्रेष्ठं श्वासादिरोगेषु विशेषतः प्रशस्तम्** ( सुसू. ४५.१३६ )

मध. पिंगट रंगाच्या मोठ्या माशांनी जमविलेला. त्याचे **गुण**—फार हलका, रूक्ष, श्रेष्ठ, श्वास वगैरे रोगांत उत्तम.

**(माक्षिकी )**—वि., **मक्षिकायाः इयम्** (चचि. १७.१३२) माशांपासून झालेली ती माक्षिका. ( उदा० विष्ठा )

**–ज**—न., **सिक्थकम्** ( रा. १३.१७४ ) मेण.

**–धातु**—पु., **खनिज धातु० स्वर्णमाक्षिकम्, माक्षिकम्** ( चचि. ७.७० ) सुवर्णमाक्षिक.

**–फल**—पु., **वनस्पति० मधुनारिकेरः** ( रा. ११.२१० ) गोड नारळ, मोहाचा नारळ.

**माक्षीक**—न., **खनिज० माक्षिकम्** ( र. १.१; रा. १३.२०९ ) सुवर्णमाक्षिक, सोनामुखी.

**–शर्करा**—स्त्री., **मधुशर्करा** ( ध. २.१०६; रा. १४.१६८ ) मधाची साखर.

**मागध**—पु., **वनस्पति० जीरकम्** ( ध. २.६६; रा. ६.१०० ) जिरे.

**( मागधी )**—स्त्री., **वनस्पति० पिप्पली** ( सुचि. ८.४२; ध. २.७३; रा. १०.२५० ) पिंपळी.

**मागधिका**—स्त्री., **वनस्पति० पिप्पली** ( सुउ. ११.१२ ) पिंपळी.

**–विधान**—न., **पिप्पलीरसायनम्** ( सुउ. ४१.५७ ) पिंपळीचा रसायनदृष्टीने सेवनविधि.

**मागधिकादिसिद्धतैल**—न., **तैल० पिप्पल्यादिक्वाथकल्काभ्यां सिद्धं तैलम्, इदं कफजगलगण्डनाशकम्** ( सुचि. १८.४८-४९ )

या नावाचे सिद्धौषध ( तेल ) पिंपळी इत्यादिकांचा काढा व चटणीने सिद्ध केलेले कफज गलगंड नाशक.

**माङ्गल्य**—स्त्री., **धान्य० मुद्गः** ( ध. ६.८१ ) मूग.

**( माङ्गल्या )**—स्त्री., **वनस्पति० गोरोचना** ( ध. ३.२० ) गोरोचन. गाईच्या यकृतातील पित्ताशयात निर्माण झालेला पित्ताचा खडा.



जीवन्ती ( ध. १.१४० ) हरिणदोडी.

**माङ्गल्याह्वा**—स्त्री., **वनस्पति० त्रायमाणा** ( रा. ५.३७९) त्रायमाण.

**माचिका**—स्त्री., **वनस्पति० अम्बष्ठा, तद्गुणाः—कषाया, वातकफघ्नी, पित्तप्रकोपशमनी, व्रणशोधनरोपणी** ( ध., ३.११६ )

मोरशिखा.

गुण—तुरट, घशाला हितकर, व्रणाचे शोधन व रोपण करणारी वातकफनाशक व पित्ताचा प्रकोप शमन करणारी आहे.

**माचीक**—पु., **वनस्पति० देवदारुः** ( चवि. ८.१४४ ) देवदार.

**माञ्जारिक**—पु., **वनस्पति० अपामार्गः** ( रा. ४.३८८ ) अघाडा.

**माञ्जिष्ठ**—वि., **माञ्जिष्ठायाः इदम्, मञ्जिष्ठासम्बन्धि** ( चनि. ४.२५ )

मंजिष्ठासंबंधी. मंजिष्ठ वगैरे द्रव्यांचा काढा, आसव इत्यादी.

**–कल्क**—पु., ( **परिव०** ) **भैषज्य० मञ्जिष्ठायाः कल्कः** (सुउ. ४०.१२१) मंजिष्ठेची चटणी.

**–चूर्ण**—न., **भैषज्य० मञ्जिष्ठाचूर्णम्, रक्तातिसारे उपयुक्तम्** ( सुउ., ४०.१२१ )

मंजिष्ठाचूर्ण. रक्तातिसारात उपयुक्त.

**–मेह**—पु., **रोग० प्रमेह० नरः पित्तस्य परिकोपात् मञ्जिष्ठोदकसंकाशं भृशं विस्रं प्रमेहति** ( चनि. ४.२५ )

मंजिष्ठामेह. यात पित्ताच्या प्रकोपाने मंजिष्ठेच्या पाण्याच्या रंगासारखे व अति दुर्गंधी मूत्र होते.

**माठर**—पु., **ऋषि०** ( कासंसि. १.११ ) ऋषीचे नाव.

**–माड**—पु., **वनस्पति० कषायः, शिशिरो, रुच्यो, दाहकरो, वातपित्तश्लेष्मकृत्, तृष्णापहः, श्रमहृत्** ( ध. ५.७० )

ताडाच्या झाडाचा प्रकार. तुरट, थंड, रुचकर, दाहकर, वातपित्तकफकर, तहान व श्रम हारक.

**–द्रुम**—पु., **वनस्पति० माडः** ( ध. ५.७० ) सिंदीचे झाड.

**माणिका**—स्त्री., **मान० अष्टौ पलानि, द्विकुडवम्** ( चचि. १८.४३) प्रमाण, ३२ तोळे.

**माणिक्य**—न., **रत्न० पद्मरागम्** ( र. ४.६ ) **गुणाः—दीपनं, वृष्यं, कफवातक्षयार्तिनुत्, भूतवेतालपापघ्नं,**

**कर्मजव्याधिनाशनम्** (र. ४.१३) **माणिक्यं द्विविधं,- पद्मरागाख्यं नीलगन्धि च तत् तु वृत्तायतं समं गात्रं श्रेष्ठमुच्यते** ( र. ४.९-१० )

माणिक्य नावाचे रत्न. पद्मराग. **गुण**—अग्निदीपक, शुक्राला परिपोषक, कफवात, क्षय नाशक. भूत, वेताल, पाप कर्मज रोग नाशक. **प्रकार**—२. गुलाबी व निळ्या छटेचा. जे वाटोळे व पसरट सगळीकडून सारखे ते श्रेष्ठ.

**-तिलक**—पु., पारदयोग० **पारदगन्धकमाक्षिकाभ्रकादीनि समभागिकानि शतावरीरसेन मञ्जिष्ठादिकषायेण च संमर्द्य विशोष्य च पक्वमूषायां पचेत् । अयं कुष्ठनाशनः** ( र. २०.८२-८५ )

सिद्धौषधीचे नाव. पारा, गंधक, सुवर्णमाक्षिक, अभ्रक इत्यादींना शतावरीरस, मंजिष्ठादि काढ्याच्या भावना देऊन मुसेत पचवावे. कुष्ठनाशक.

**माणिभद्रक**—पु., गुडयोग० **अर्शसश्चिकित्सायामुपयुक्तः** ( असंचि. १० )

या नावाचे गुळाने युक्त औषध. मूळव्याध, रोगात उपयुक्त.

**माणिमन्थ**—न., **सैन्धवम्** ( र. १८.१३९-४१ ) सैंधव.

**माण्डव्य**—पु., ऋषि० **सप्तविंशतिसंख्याकेष्वन्यतमो रससिद्धिप्रदायकः** ( र. १.२-५ )

माण्डव्य नावाचे ऋषि. २७ रससिद्धांपैकी.

**मातङ्ग**—पु., देश० **कुरुक्षेत्रस्य पूर्वप्रदेशे विद्यमानः** ( काखिल. २५.९ )

मातंग देश. कुरुक्षेत्राच्या पूर्वेस असलेला.

**( मातङ्गी )**-स्त्री., रेवतीग्रह० **सा नवमेऽहनि अपत्यं विनाशयति** ( का. रेवतीक. )

एक रेवतीग्रह, नवव्या दिवशी मूल मारते.

**मन्त्रविद्या० मतङ्गेन महर्षिणा कश्यपपुत्रेण कनीयसाऽऽसादिता, सा दुःस्वप्नकलिरक्षोघ्न्यभिशापनाशनी च** ( काकरेवती. )

मंत्रविद्या. कश्यपाचा धाकटा मुलगा मतंग याने ही प्राप्त केली. ती दुष्ट स्वप्ने झगडा, राक्षस नाशक व शाप नाशक.

**मातंगजचर्मन्**-( परिव० ) न., **हस्तिनश्चर्म, इदं श्वित्रे लेपार्थमुपयुज्यते** ( सुचि. ९.१६ )

हत्तीचे कातडे. कोडावर लेपाकरिता उपयुक्त.

**मातरिश्वन्**—पु., **वातः** ( सुशा. ६.१९ ) वायु, वात.

**मातुलक**—पु., **धत्तूरः** ( रा. १०.११ ) धोतरा.

**मातुलिङ्ग**—पु., वनस्पति० **मातुलुङ्गः** ( रा. ११.२२ )

महाळुंग.

**मातुलिङ्गिका**—स्त्री., वनस्पति० **वनबीजपूरकः** ( रा. ११.३४ ) **अम्ला, कटुरुष्णा, रुचिप्रदा, वातविनाशनी, कफापहा, अम्लदोषा, क्रमिनाशकारी, श्वासनिषूदनी** ( रा. ११.३४ )

रानमहाळुंग. आंबट, तिखट, उष्ण, रुचिदायक, वातकफनाशक, श्वासनाशक, क्रमिनाशक, व अम्लदोषकारी.

**मातुलुङ्ग**—पु., फल०, गुणाः—**अम्लः, कटुः, उष्णः, लघुः, कण्ठशोधनः, दीपनः, हृद्यः, पाचनः, श्वासकासाऽरुचितृष्णाहरः** (ध. ५.२२) **छर्दिनिग्रहणः** (चसू. ४.१४) **प्रलेपाद्वातशोफजित्** (सुसू. ३७.३) **मातुलुङ्गत्वक् तिक्ता, दुर्जरा, वातकफापहा, क्रिमिघ्नी च, मातुलुङ्गमांसं स्वादु शीतं गुरु स्निग्धं मेध्यं मारुतपित्तजित् शूलवातजच्छर्द्यरोचकनाशनम् । मातुलुङ्गकेसरं लघु दीपनं संग्राहि गुल्मार्शोघ्नं च** ( सुसू. ४६.१४९-१५१ ) **विबन्धमंदाग्नि मद्यविप्लव-हिक्का-श्वास-कास-वर्चोगदघ्नं च** ( चसू. २७.१५४ ) **मातुलुङ्गरसः शूलाऽजीर्णविबन्धेषु मन्देऽग्नौ, अरुचौ कफमारुतयोश्च विशेषेण उपदिश्यते** (सुसू. ४६.१५२) **मातुलुङ्गमम्लफलेषु श्रेष्ठम्** (सुसू. ४६.३३४) **मातुलुङ्गबीजं तिक्तं पथ्यं कफशमनं अर्शःश्वयथुनाशनम्** ( रा. ११.३० ) **मातुलुङ्गमूलं क्रमीन् हन्ति** ( ध. ५.३० )

( ध. ५.३० ) **मातुलुङ्गपुष्पं गुल्मजित्**

हिं.—बिजोरा, माफल.

**म.—महाळुंग.**

गु.—बालंक, बिजौरा, बिजोरु लिंबू.

बं.—छोलोंगो नेबू.

फा.—तुरंज.

महाळुंग फळ. आंबट, उष्ण, तिखट, लघु, कंठशोधक, दीपन, हृद्य, पाचन, श्वास-कास-अरुचि-तृष्णा नाशक आहे. वांती थांबवते. **त्याची साल**— कडु पचावयास जड, वातकफनाशक व क्रमिघ्न आहे. **महाळुंगगर**—गोड, थंड, गुरु, स्निग्ध, मेध्य, वातपित्तशामक, शूल—वातज ओकारी—अरोचक नाशक आहे. **महाळुंगाचा केसर**— ( रस येणारा ) लघु, दीपन, संग्राहि, गुल्म, अर्श, अवष्टंभ, अग्निमांद्य, मद्याचे दुष्परिणाम, उचकी, श्वास, खोकला व पुरीषमलसंबंधी रोग नाशक आहे.

**महाळुंगाचा रस**—शूल अरुचि अजीर्ण–विबंध–अग्निमांद्य –कफवात नाशक आहे. आंबट फळात महाळुंग श्रेष्ठ. **बी**—कडु, पथ्यकर, कफशामक, मूळव्याध, सूजनाशक; **मूळ**—कृमिनाशक. **फूल**—गुलमहर.

**मातुलुङ्गाम्ल**–न., मातुलुङ्गरसः ( सुचि. ५.२८ )
महाळुंगाचा रस.

**मातुलुङ्गासव**–पु., **आसुत० अयं सामुद्रमत्स्यानामनुपान०** ( सुसू. ४६.४३३ )
आसवाचे नाव. हे समुद्रातील मासे खाल्ल्यानंतर अनुपानास उपयुक्त.

**मातुलुङ्गी**–स्त्री., **वनस्पति० सुरभिफलोऽरण्यबीजपूरकः, तत्पुष्पम् शिरोविरेचनार्थमुपयुज्यते** ( सुसू. ३९.६ )
रानमहाळुंग. सुगंधी फळ. याचे फूल डोक्याचे रेचक म्हणून उपयोगी.
**मधुकर्कटी** ( सुउ. ४५.३६ ) गोड मोठे खरबूज.

**मातृ**–स्त्री., **जननी** ( सुशा. ३.३१ ) आई. मातुश्री.
**ग्रहमातृ० सेना सुसेना माता च महासेना यशस्विनी** ( असंउ. ४ ) ग्रहमातृका. नावे वर आहेत.
**रेवतीग्रहस्य नाम** ( कासं. बालग्रहचि. )
रेवतीग्रहाचे नाव.
**कफजकृमि०** ( असंनि. १४.५४-५५ )
कफज कृमींचे नाव.
**वनस्पति० हरीतकी** ( काकल्प. ) हिरडा.
**मांसी वनस्पति०** ( रा. १२.९१ ) जटामांसी.
**वनस्पति० इन्द्रवारुणी** ( रा. ३.३७१ ) इंद्रावण.
**वनस्पति० महामुण्डी** (रा. ५.२२०) मोठी मुण्डी.
**वनस्पति० मूषककर्णी** ( रापरि. ३.२२ )
उंदीरकानी.

**–ज**–वि., मातुः शरीरादागतः ( अवयवविशेषः ) **गर्भस्य मातृजानि अंगानि–त्वक् च लोहितं च मांसं च मेदश्च नाभिश्च हृदयं च क्लोम च यकृच्च प्लीहा च वृक्कौ च बस्तिश्च पुरीषाधानं चामाशयश्च पक्वाशयश्चोत्तरगुदं चाधरगुदं च क्षुद्राऽन्त्रं च स्थूलाऽन्त्रं च वपा च वपावहनं चेति** ( चशा. ३.६ ) **मज्जा मातृजः** (सुशा.३. ३३) **आमाशयगर्भाशयक्लोमानि मातृजानि** ( असंशा. ५.१४ )
आईच्या शरिराचे भाव अधिक असणारी–झालेली अंगे–त्वचा, रक्त, मांस, मेद, नाभि, हृदय, क्लोम, यकृत, प्लीहा, वृक्क, बस्ति, मलाशय, आमाशय, पक्वाशय, उत्तरगुद, अधरगुद, मोठे आतडे, लहान आतडे, वपा, वपावहन मज्जा, गर्भाशय.

**–नन्दिन्**–पु., **वनस्पति० गुच्छकरञ्जः** (रा. ९.१८४)
वावळा.

**–निन्दक**–पु., **प्रतुदपक्षि० प्रियात्मकः, पुत्रञ्जक इति** ( ड. सुसू. ४६.६७ )
भक्ष्याला टोचून खाणाऱ्या पक्ष्याचे नाव.

**–हृदय**–न., **शारीर० मातुः हृदयम्** (चशा. ४.१५)
आईचे हृदय.

**मातृक**–पु., **वनस्पति० ऋषभः** ( ध. १.१२५ )
अष्टवर्गांपैकी एक ऋषभक.

**–केश**–पु., **गोकेशः, अयं धूपनार्थमुपयुज्यते** ( का. धूपकल्प. )
गाईचा केस. धुरी देण्यास उपयुक्त.

**( मातृका )**–स्त्री., **सिरा०** ( असंशा. ७.२३ )
मातृका सिरा.

**–दोष**–पु., **बालरोग० मलोपलेपात् स्वेदाद्वा गुदे रक्तकफोद्भवस्ताम्रो व्रणो जायते स कण्डूमान् अन्तर्भागे भवति भूर्युपद्रवश्च** ( असंउ. २ )
बालरोगाचे नाव. गुदात घाम किंवा मळाचा लेप यांनी रक्त व कफाने आतल्या भागात तांबडा व्रण होतो, त्यात खाज, अनेक उपद्रव होतात.

**–मर्मन्**–न., **मर्म० ऊर्ध्वजत्रुगतं ग्रीवायां चतुरङ्गुलप्रमाणम्** ( सुशा. ६.२७ ) **इदं सिरामर्म** ( सुशा. ६.७ ) **सद्यःप्राणहरम्** ( सुशा. ६.९ ) **अष्टौ मातृकामर्माणि** ( सुशा. ६.६ ) **ग्रीवायामुभयतश्चतस्रश्चतस्रःसिरा मातृकाः** (सुशा. ६.२७)
या नावाची मर्मे., संख्या ८. गळसरीच्या हाडाच्या वर मानेत आहेत. दोन्ही बाजूला चार चार शिरा मातृका नावाच्या आहेत. शिरामर्म. याचा वेध झाला तर ७ दिवसात मृत्यु.

**मात्रा**–स्त्री., **अनपायिपरिमाणम्** ( चसू. १३.५ )
अपाय न करणारे प्रमाण.
**प्रमाणम्** ( सुचि. ३१.२५ ) प्रमाण.
**कालमान०** ( अहृसू. २२.३३ ) **निमेषोन्मेषकालेन समं यावत्कालं हस्ताग्रं दक्षिणं जानुमण्डलं पर्येति, सा तु मात्रा स्मृता** ( अहृसू. २२.३३ )
कालाचे प्रमाण. डोळ्याची एक उघडझाप, गुडघ्याभोवती हाताचे टोक एक वेळ फिरवण्यास लागतो तो काळ म्हणजे १ मात्रा होय.

**आक्षिनिमेषः** ( असंसू. ४.५ ) **पुंसां यावत्काले निमेषोन्मेषणं भवति अङ्गुलेर्वा स्फोटनं लघोर्वाप्यक्षरस्य उच्चारणं भवेत्, सा मात्रा इत्युच्यते**
(ड. सुचि. ४.२०)
ज्या काळात डोळ्याची उघडझाप होते, अंगुळींनी चुटकी वाजते, लहान अक्षराचा उच्चार होतो तेवढा काल म्हणजे १ मात्रा होय.

**आहारस्याऽनपायि परिमाणम् तत्र कुक्षेरपीडनं, पार्श्वयोरविपाटनमन्नेन हृदयाऽऽबाधो जठरस्य तु गौरवं, चक्षुरादीनां प्रीणनं क्षुत्पिपासयोः शमनमुच्छ्वासश्वासहास्यादिकथासु सुखवर्तनमन्ने भुक्ते दिवा निशि च सुखेन परिणाम इति लक्षणान्याहारमात्राया भवन्ति**
( सुसू. ४६.४६५-४६६ ) **मात्रां द्रव्याण्यपेक्षन्ते, गुरुद्रव्याणामल्पा मात्रा लघुद्रव्याणां यावत्तृप्तिर्मात्रोक्ता, तथा मात्रा अग्निमपेक्षते** (चसू. २७.३४१)
भूक लागल्यावर ज्या प्रमाणात आहार घेतला असता सुखाने पचतो ते प्रमाण. मात्रेने आहार घेतला तर डोळे, नाक इत्यादी इंद्रियांची संतुष्टता, भूक व तहान यांचे शमन, श्वासोच्छ्वास, हासणे, बोलणे हीं सुखाने होणे कुशीत अन्नाने पीडा न होणे, फासळ्या ताणल्या न जाणे, हृदयाला पीडा न होणे, आमाशय मात्र जड वाटणे आणि दिवसा व रात्री खाल्लेल्या अन्नाचे सुखाने पचन व रसादि धातूत परिणमन न होणे. आहार द्रव्यांना प्रमाणाची अपेक्षा असते. जड द्रव्यांची मात्रा कमी व हलक्या द्रव्यांची मात्रा तृप्ति होण्यापुरती असावी, हेच प्रमाण सांगितले आहे. मात्रा ही व्यक्तीच्या जठराग्नीवरच अवलंबून असते.

**अल्पत्वम्** ( असंसू. २५. ४०-४१ )
अल्पसे, थोडेपणा.

**–गुरु**–वि., **यद् मात्रया गुरु तत्, अतिमात्रमित्यर्थः**
( चसू. ६.९ )
जे प्रमाणाने अधिक जड होते ते, ते अतिमात्र गुरु म्हणावे.

**–प्रमाण**–न., **मात्रायाः प्रमाणम्** ( चसू. ५.४ )
प्रकृतीला त्रासदायक न होता योग्य वेळात जे पचते ते मात्रा प्रमाण समजावे.

**–बस्ति**–पु., **उपक्रम० अनुवासनबस्तेर्भेदः**
(सुचि. ३५.१८) **स्नेहपानस्य स्वया मात्रया समो योजितः स्नेहः मात्राबस्तिरिति स्मृतः, स बालवृद्धाऽध्वभारस्त्रीव्यायामाऽऽसक्तचिन्तकैर्वातभग्नाऽबलाऽल्पाग्निनृपेश्वरसुखात्मभिः सदा शीलनीयः, यश्च निष्परीहारो दोषघ्नो बल्यः सृष्टमलः सुखश्च**
( अहसू. १९.६७-६९ )
मात्राबस्ति. अनुवासनबस्तीचा भेद. स्नेहपानाची जी अल्पमात्रा तिच्या इतक्या स्नेहाचा जो बस्ति तो. बालक, वृद्ध, मार्गक्रमण, भार वहाणे, स्त्रीसंभोग, व्यायाम यांनी थकलेला, चिंतनशील, वातविकारी, अस्थिभंग झालेला, अबल, मंदाग्नि, राजा सुखात्मा, यानी नेहमी हा बस्ती घेणे चांगले. याला काहीही अपथ्य नाही. हा बलकर, दोषनाशक, मळ साफ करणारा सुखकारक असतो.

**–विकल्पज्ञ**–वि., **अन्नादिद्रव्याणां गुरुलघुगुणाऽपेक्षया प्रमाणज्ञः** ( चचि. ३.१९३-१९४ )
आहारादिकांचे जड, हलके इ० गुणांचे यथायोग्य प्रमाण जाणणारा.

**मात्राशितीय**–वि., **मात्राशितमधिकृत्य कृतोऽध्यायसंज्ञाविशेषः** ( चसू. ५.११ )
अध्यायाचे नाव. आहारमात्रेबद्दल माहिती यात आहे.

**मात्राशिन्**–वि., **मात्रया अशितुं शीलं यस्य, सः**
( चसू. ५.३ )
प्रमाणशीर खाण्याचा स्वभाव असणारा तो मात्राशी होय.

**मात्सर्य**–न., **परगुणेष्वमाध्यस्थ्यं क्रौर्यं वा**
(सुसू.१.२५(३))**परगुणासहिष्णुत्वम्** (अहसू.४.२४)
दुसऱ्याच्या गुणांचा द्वेष करणे. दुसऱ्याचे गुण सहन न होणे.

**मात्स्य**–वि., **मत्स्यस्य इदं, मात्स्यम्** (चसू. १३.८३)
माशाचे जे ते ( तेल, मांस, पित्त, इत्यादि. )
न., **चित्तप्रकृति० तामससत्त्वस्यैकः प्रकारः भीरुमबुधमाहारलुब्धमनवस्थितमनुषक्तकामक्रोधं सरणशीलं तोयकामं मात्स्यं सत्त्वं विद्यात्**
(चशा. ४.३९(२)
मनाचा तामसी स्वभाव असणारा एक प्रकार. लक्षणे–भित्रा, समज नसलेला, खाण्या व पिण्याची इच्छा सतत असणारा, अस्थिर, अतिकामवासना व राग असणारा, एके ठिकाणी बसणे आवडत नाही असा मात्स्यवृत्तीचा मनुष्य असतो.

**मादन**–पु., **वनस्पति० मदनः** (रा. ८.२३१) गेळफळ.

न., मत्तताकरणम् (सुसू. ४०.५)
मद–माज आणणे.

**(मादनी)**–स्त्री., वनस्पति० माकन्दी (रा. ७.१५)
सुगंधी, पुष्कळ मुळांची काळसर वनस्पती.

**मादिका**–स्त्री., वनस्पति० भङ्गा (ध. १.१३०) भांग.

**मादु**–स्त्री., वनस्पति० भङ्गा (ध. १.१३०) भांग.

**माद्री**–स्त्री., वनस्पति० अतिविषाभेदः कृष्णाऽतिविषा (वैशसिं.)
अतिविषप्रकार, काळे अतिविष.

**माधव**–पु., वैशाखमासः (चसू. १३.१८; सुसू. ६.६)
वैशाख महिना.
पु., वनस्पति० मुद्गः (ध. ६.८१) कृष्णमुद्गः (असंचि. ७) काळा मूग.
पु., वनस्पति० मधुकः (ध. ५.४५) ज्येष्ठमध.
पु., मद्य० मधुकृतं मद्यम् (सुउ. ५७.१४-१५) अरोचकघ्नम्, मध्वरिष्टम् (असंचि. ७)
मधाचे अरिष्ट किंवा मधाचे मद्य. अरुचिनाशक.
वि., मधुना संस्कृत० (अहसू. ३.२२)
मधाचा संस्कार झालेले.

**(माधवी)**–स्त्री., वनस्पति० अतिमुक्ताख्यो लता० (अहसू. ३.३४; ध. ५.१५३) कस्तुरमोगरा.
स्त्री. वनस्पति० वासन्ती (ध. ५.१३९; रा. १०.२३४) पांढरी जाई.
स्त्री., मधुशर्करा (ध. २.१०६) मधाची साखर.
स्त्री., वनस्पति० वाराही (ध. ४.९२) डुकरकंद.
स्त्री., वनस्पति० लता० गुणाः–कटुतिक्तकषाया मदगन्धिका, पित्तघ्नी कासव्रणदाहशोकनाशिनी (रापरि. १०.२९)
कस्तुरमोगरी. **गुण**—तिखट, कडु, तुरट, खूप सुगंधी, पित्त, खोकला, दाह, व्रण, शोकनाशक.
स्त्री., वनस्पति० शतपुष्पा (ध. २.१) बडिशेप.
स्त्री., सुरा (ध. ६.२५५) दारू.
**–द्रुम**–पु., वनस्पति० आम्रः (रा. ११.१) आंबा.
**–प्रथम**–वि., माधवो वैशाखः, तस्य प्रथमः नाम तदादौ भवः (चैत्रः) (चसू. ७.४६)
माधव म्हणजे वैशाख. त्याचे पूर्वीचा म्हणजे चैत्र.
**–प्रिय**–न., वनस्पति० कालीयकम् (रा. १२.१५)
चंदन.

**माधवेष्टा**–स्त्री., वनस्पति० बाराही (रा. ७.१३४)
डुकरकंद.

**माधवोचित**–न., वनस्पति० कक्कोलकम् (ध. ३.३७)
कंकोळ.

**माधवोद्भव**–पु., वनस्पति० क्षीरी (रा. ११.१४६)
खिरणी.

**माधुतैलिक**–पु., बस्ति० अस्मिन् बस्तौ मधु तैलं च प्राधान्येन प्रदीयते इत्यसौ माधुतैलिक इत्युच्यते (सुचि. ३८.१०१) माधुतैलिकस्य पर्यायः, यापनो युक्तरथो दोषहरः सिद्धबस्तिरिति (सुसू. २८.५) माधुतैलिकबस्तियोग्या मृदुकोष्ठाः सुखिनोऽल्पदोषा नित्यस्निग्धाश्च (सुचि. ३८.११७)
मध व तेल यांचा ज्या बस्तीमध्ये प्राधान्याने उपयोग करतात, तो माधुतैलिक बस्ति. याचे पर्याय यापना, युक्तरथ, दोषहर, सिद्धबस्ति. मृदु कोठा असलेले सुखी, अल्पदोषी, नेहमी स्निग्ध आहार व अभ्यंग करणारे यांना माधुतैलिक बस्ति योग्य.

**माधुमेहिक**–वि., मधुमेहजम् (चसू. १७.७)
मधुमेहापासून झालेले.

**माधुर्य**–न., मधुरता (चनि. ४.४७) गोडी.

**माधूक**–वि., मधुकस्येदम् (अहसू. १५.४)
मोहाच्या फुलापासून झालेले काढा मद्य इत्यादी.

**माध्वी**–स्त्री., शर्कराविशेषः (रा. १४.१६८) गुणाः–बल्या, वृष्या, तर्पणी च (रा. १४.१६८)
मधाची साखर. **गुण**—बलकर, शुक्रवृद्धिकर, धातूंना पोषक.
स्त्री., वनस्पति० पिण्डखर्जूरिका (रा. ११.७१)
पेंडखजूर.

**माध्वीक**–वि., मधूद्भवम् (चसू. ६.२६)
मधाचे बनविलेले आसव, साखर इ०.
न., सुरा (१४.३०२) मधाची दारू.
न., मधुयोनिमद्यम् चिरसंस्थितं च (ड.,) द्राक्षासवः (जेज्जट,) प्रमेहेषु पानार्थमुपयुज्यते (सुचि. ११.११) मधापासून झालेले जुने मद्य. द्राक्षासव. प्रमेहात पिण्याकरिता उपयुक्त.

**(माध्वीका)**–स्त्री., धान्य० श्वेतनिष्पावः (रा. १६.१७५)
पांढरा पावटा.
**–फल**–पु., वनस्पति० मधुनारिकेरः (रा. ११.११०)
गोड नारळ. मोहाचा नारळ.

**मान**–न., प्रमाण० त्रिविधं मानम्–तुलामानं, प्रस्थमानं, अङ्गुलीमानं चेति। 'मानं तुलाङ्गुलीप्रस्थैः' इत्यमरः (अमर. २; वैश्यवर्ग. ८५) पुनश्च द्विविधं

कालिङ्गं मागधं चेति। तत्र कालिङ्गात् मागधं श्रेष्ठम् (चक. १२.१०५) चरकोक्ता मानपरिभाषा–षड् ध्वंश्यो मरीचिः स्यात्, षण्मरीच्यः सर्षपः, अष्टौ रक्ताः सर्षपास्तण्डुलः, तण्डुलद्वयं धान्यमाषः, धान्यमाषद्वयं यवः, चत्वारो यवाः अण्डिका, चतस्रः अण्डिका माषकः, माषकत्रयं शाणः (षाणः) (चत्वारो माषकाः शाणः) (असंक. ८) द्वौ शाणौ द्रंक्षणः, द्वौ द्रंक्षणौ कर्षः, द्वौ कर्षौ शुक्तिः, द्वे शुक्ती पलं, द्वे पले प्रसृतं, प्रसृतद्वयं कुडवः, द्वौ कुडवौ मानिका, मानिकाद्वयं अर्थात् चत्वारः कुडवाः प्रस्थः, चतुःप्रस्थमाढकम्, प्रस्थाऽष्टकं कंसः (चक. १२.८७-९४) चत्वारि आढकानि द्रोणः, चत्वारो द्रोणा वहः (असंक. ८) शतं पलानि तुला (चक. १२.९७) तुलाविंशतिः, द्विसहस्रपलानि वा भारः (असंक. ८) सुश्रुतोक्ता मानपरिभाषा– पलकुडवादीनामतो मानं तु व्याख्यास्यामः– तत्र द्वादश धान्यमाषा मध्यमाः सुवर्णमाषकाः ते षोडश सुवर्णम्, अथवा मध्यमनिष्पावा एकोनविंशतिर्धरणं, तान्यर्धतृतीयानि कर्षः, ततश्चोर्ध्वं चतुर्गुणमभिवर्धयन्तः पलकुडवप्रस्थाऽऽढकद्रोणा इत्यभिनिष्पद्यन्ते, तुला पुनः पलशतं, ताः पुनर्विंशतिर्भारः, शुष्काणामिदं मानम्, आर्द्रद्रवाणां च द्विगुणमिति (सुचि. ३१.७) रसरत्नसमुच्चयोक्ता मानपरिभाषा–षट् त्रुटयः एका लिक्षा, षट् लिक्षा यूका, षट् यूका रजः, षट् रजांसि सर्षपः, षट् सर्षपा यवः, षट् यवा गुञ्जा, तिस्रो गुञ्जाः वल्लः, षट् गुञ्जा माषः, द्वादशमाषास्तोलः अष्टौ तोलाः पलम्। रसरत्नसमुच्चये रसोपयोगिनी मानपरिभाषा–षडणवस्त्रुटिः, षट् त्रुट्यो लिक्षा, षड् लिक्षा यूका, षड् यूका रजः, षड् रजांसि सर्षपः, षट् सर्षपा यवः, षड् यवा गुञ्जा, गुञ्जाद्वयं निष्पावः, गुञ्जात्रितयं वल्लः, द्वौ वल्लौ माषः, द्वौ माषौ धरणम्, द्वे धरणे शाणः, स एव निष्कः, निष्कद्वयं वटकः, स एव कोलः, कोलत्रितयं तोलः। निष्कचतुष्टयं कर्षः, द्वौ कर्षौ शुक्तिः द्वे शुक्ती पलम्, केचित् शुक्तित्रयं पलं विदुः। पलद्वयं प्रसृतम्, द्वे प्रसृते, कुडवः, सा एव अञ्जलीः, द्वौ कुडवौ मानिका, द्वे मानिके प्रस्थः, प्रस्थद्वयं शुभं, शुभद्वयं पात्रकं, पात्रकद्वयमाढकं, चत्वारि आढकानि द्रोणः। पलानां शतं तुला, चत्वारिंशत्तुला भारः (र. १.११-१३) वाग्भटस्तु 'शाणं पाणितलं मुष्टिं कुडवप्रस्थमाढकम्। द्रोणं वहं च क्रमशो विजानीयाच्चतुर्गुणम् (अहृक. ६.२२) भावमिश्रस्तु 'मागधपरिभाषायां षड्रक्तिको माषश्चतुर्विंशतिरक्तिकष्टङ्कः, षण्णवतिरक्तिकः कर्षः। अयं चरकसम्मतः। सुश्रुतमते तु पञ्चरक्तिको माषः, विंशतिरक्तिकष्टङ्कः, अशीतिरक्तिकः कर्षः। अयमेव कालिङ्गपरिभाषायामपि। यतस्तत्राष्टरक्तिको माषो द्वात्रिंशद्रक्तिकष्टङ्कः, सार्धटङ्कद्वयमितः कर्षः॥' कलौ नराणां मन्दाग्नित्वात् ह्रस्वत्वात् हीनसत्त्वत्वात् च तद्योग्या सुज्ञसम्मता मानपरिभाषा, भावमिश्रमतेन प्रोच्यते, द्वादश गौरसर्षपाः यवः, यवद्वयं गुञ्जा, त्रिगुञ्जो वल्लः, अष्टगुञ्जाः माषः, क्वचित् सप्तगुञ्जाः माषः, माषचतुष्टयं शाणः, षण्माषको गद्याणः, दशमाषकः कर्षः, कर्षचतुष्टयं पलं, दशशाणमितं पलं, चतुष्पलं कुडवः, शेषं पूर्ववत् वाग्भटमतानुसारेण ज्ञेयम् (भा. प्र.) प्रमाण; अथवा माप. यांचे प्रकार तीन. तोलणे, मापणे आणि मोजणे. यापैकी घट्ट पदार्थ किंवा द्रव पदार्थ काट्यात घालून त्याचे प्रमाण ठरविले जाते, त्याला तोलणे म्हणतात. त्याप्रमाणेच मापात (शेर, पायली वगैरे) घालून प्रमाण ठरवितात त्याला मापणे म्हणतात, आणि अंगुळांनी मोजून प्रमाण ठरवितात त्याला अंगुलिमान म्हणतात. अशी प्रमाणे आहेत. त्यांचे प्रकार ग्रंथकार, देश, राज्य, काल या प्रमाणाने निरनिराळे आहेत. कलिंग देशाचे एक व दुसरे मागध देशाचे अशी दोन देशमाने आहेत.

चरकाचार्यांनी मानपरिभाषा प्रकरणात जी प्रमाणे सांगितली ती चरक–प्रमाणे झाली. याप्रमाणे सुश्रुतोक्त, रसरत्नसमुच्चयोक्त, वाग्भटोक्त, भावमिश्रोक्त अशा नावांनी सुद्धा प्रसिद्ध आहेत.

**चरकोक्त मान परिभाषा**

६ ध्वंशी = मरीचि
६ मरीचि = सर्षप
८ सर्षप = तंडुल
२ तंडुल = माष
२ माष = यव
४ यव = अंडिका
४ अंडिका = माषक
३ माषक = शाण

२ शाण = द्रंक्षण
२ द्रंक्षण = तोळा
२ तोळे = शुक्ति
२ शुक्ति = पल = ४ तोळे
२ पल = प्रसृत = ८ तोळे
२ प्रसृत = कुडव = १६ तोळे
२ कुडव = मानिका = ३२ तोळे
२ मानिका = प्रस्थ = ६४ तोळे
४ प्रस्थ = आढक = २५६ तोळे
८ प्रस्थ = कंस = ५१२ तोळे
४ आढक = द्रोण = १०२४ तोळे
४ द्रोण = वह = ४०९६ तोळे
१०० पले = तुला ४०० तोळे
२० तुला = भार = ८००० तोळे
२ हजार पले = भार.

चरक, सुश्रुत, वाग्भट, रसरत्नसमुच्चय, भावप्रकाश यांच्या परस्पर मतात फरक आहे. ते ज्या देशात व कालात वास्तव्य करीत असत त्या त्या देश कालाप्रमाणे तो फरक दिसतो. त्या त्या ग्रंथाचा औषधि योग, प्रयोग यांचा विचार करतांना तो ग्रंथ आधार भूत धरून विचार करावा लागतो. वरील कोष्टकात तोळ्यांचेही प्रमाण तोळ्या पेक्षा अधिक वजनापुढे दिले आहे, त्यावरून चटकन कल्पना येईल.

**सुश्रुतोक्त मान.**

१२ धान्यमध्यम माष = १ सुवर्णमाषक
१६ सुवर्णमाषक = १ सुवर्ण
१९ मध्यम निष्पाव = १ धरण
२॥ धरण = १ कर्ष
४ कर्ष = १ पल
४ पल = १ कुडव
४ कुडव = १ प्रस्थ
४ प्रस्थ = १ आढक
४ आढक = १ द्रोण
१०० पल = १ तुला
१०० तुला = १ भाग

शुष्क द्रव्यांचे हे परिमाण आहे. ओली द्रव्ये दुप्पट घ्यावी.

**रसरत्न समुच्चयोक्त मान.**

६ त्रुटी = १ लिक्षा.
६ लिक्षा = १ यूका
६ यूका = १ रज
६ रज = १ सर्षप
६ सर्षप = १ यव
६ यव = १ गुंज
३ गुंजा = १ वाल
६ गुंजा = १ मासा
१२ मासे = १ तोळा
८ तोळे = १ पल

**याचेच रसोपयोगि मान.**

६ अणु = १ त्रुटी
६ त्रुटि = १ लिक्षा
६ लिक्षा = १ यूका
६ यूका = १ रज
६ रज = १ सर्षप
६ सर्षप = १ यव
६ यव = १ गुंज
२ गुंजा = १ निष्पाव
३ गुंजा = १ वाल
२ वल्ल = १ माष
२ माष = १ धरण
२ धरण = १ शाण किंवा निष्क
२ निष्क = १ वटक किंवा कोल
३ कोल = १ तोळा
४ निष्क = १ कर्ष
२ कर्ष = १ शुक्ति
२ शुक्ति = १ पल
काहीचे मते ३ शुक्ति = १ पल
२ पल = १ प्रसृत
२ प्रसृत = १ कुडव किंवा अंजलि
२ कुडव = १ मानिका
२ मानिका = १ प्रस्थ
२ प्रस्थ = १ शुभ
२ शुभ = १ पात्रक
२ पात्रक = १ आढक
४ आढक = १ द्रोण
१०० पळे = १ तुला
४० तुला = १ भार

**वाग्भटमते.**

शाण, पाणितल, मुष्टि, कुडव, प्रस्थ, आढक, द्रोण, वह, ही माने क्रमशः ४ पट आहेत.

**भावमिश्रमते मागध-परिभाषेत.**
६ रती = १ मासा
२४ रती = १ टंक
९६ रती = १ कंर्ष
चरकालाही हे मान्य आहे
**सुश्रुत मताने**
५ रती = १ मासा
२० रती = १ टंक
६० रती = १ कर्ष
**कलिंगमान**
८ रती = १ मासा
३२ रती = १ टंक
२॥ टंक = १ कर्ष
कलियुगात मनुष्ये लहान देहाची व मंद अग्नि व हीन सत्व असल्याने सुश्रुतमान अयोग्य. भावमिश्राची परिभाषा सूज्ञाना संमत आहे. तेः—
१२ गौर सर्षप = १ यव
२ यव = १ गुंज
३ गुंजा = १ वाल
८ गुंजा = १ मासा
काहीचे मते ७ गुंजा = १ मासा
४ मासे = १ शाण
६ मासे = १ गद्याण
१० माषक = १ कर्ष
४ कर्ष = १ पल ( १० शाण )
४ पल = १ कुडव
इतर सर्व वाग्भटमताप्रमाणे जाणावे
**सर्वत्रोत्कर्षेणाऽऽत्मनो ज्ञानम्** (सुसू. २.६ )
सर्व ज्ञानात श्रेष्ठ असे आत्मज्ञान.
**आत्मनि उत्कर्षबुद्धिः** ( ड. सुशा. १.१८ )
आत्म्याची उन्नति व्हावी अशी बुद्धि.
**प्रभावादिः विशेषः** ( चवि. १.३ )
प्रभाव वगैरे विशेष.

**–तुण्डक**–पु., जलचरप्राणि० ( चसू. २७.४१ )
पाण्यातील प्राणी.

**–द्रुम**–पु., वनस्पति० **शाल्मली** ( अहसू. १५.३७ )
सावरी.

**–विकल्पज**–वि., **वातादेः क्षयसमतावृद्धिस्वरूपस्य मानस्य परस्परसम्बन्धाऽसम्बन्धकृतः भेदः** ( चसू. १७.३ )
दोषांची क्षयावस्था, समानावस्था आणि वृद्धावस्था यात असलेल्या दोषांच्या प्रमाणावरून केलेली कल्पना.

**–विरुद्ध**–वि., **प्रमाणतो विरुद्धम्** (सुसू. २०.१५ )
प्रमाणानें विरुद्ध जसे मध तूप समान प्रमाणात मिश्रण करणे हे शरिराला विरोधी आहे.

**–मानक**–न.,कन्दशाक० **महापत्रम् यथापूर्वमधः-पत्रपरित्यागि** (ड.), **मानकन्दः, माणक इति नाम्ना प्रसिद्धः, तद्गुणाः–स्वादु, कटु, ईषत् कषायं शीतं, रुक्षं, गुरु,** ( लघु-भाप्र ) **विष्टम्भि, कफवातलं, पित्तहरं,** ( **रक्तपित्तघ्नं, शोथहृत्** ) ( रानि. सुसू. ४६.३०६-३०७ )
हिं.—सालिब मिस्री, गोरूमा.
**म.—भुईकाकली, अम्बरकन्द.**
गु.—सालम, मानकन्द.
बं.—संग मिस्रि.
फा.—संग मिस्रि.
अंबरकंद. त्याचे गुण–स्वादु, तिखट, किंचित तुरट, शीत, रुक्ष, गुरु, अवष्टंभक, कफवातपित्त-शामक, रक्तपितघ्न, सूजनाशक. या कंदाला मोठी पाने येतात. प्रथम खालची पाने गळून पडतात. अशा क्रमाने वरची पाने गळतात.

( **मानिका** )–स्त्री., मान० **कुडवद्वयम्** (चक. १२.९३)
दोन कुडव.

**मानस**–वि., **मनसः इदम्, मनःसम्बन्धि** (चसू. ११.४५)
मनाचे संबंधी; मनाचे.
न., **मनः अमर**— मन.
**मनःसंबंधि, मनोविषयकम्** ( सुचि. २४.९८ )
मनाविषयी.

( **मानसी** )–स्त्री. **ब्राह्मी** ( असंउ. ४२ ) ब्राह्मी.
**–रोग**–पु., **मनोरोगः** ( चसू. ११.४५ ) मनाचे रोग.
**–व्याधि**–पु., **मनोरोगः** ( सुसू. १.४ ) मनाचे रोग.

**मानुष**–वि., **मनुष्यस्य इदमिति मानुषम्** ( चसू. २७.२२४) मानवाचे जे.
**–पयस्**–न., **स्त्रीदुग्धम्, स्तन्यम्** (चसू. २७.२२४)
स्त्रीचे दूध.
**–मूत्र**–न., **मानवमूत्रम् तद्गुणाः–तिक्तं, लवण-मुष्णं, रूक्षं, रोचनं, पित्तकफवातघ्नं रक्तपित्तकृमि-मोहविषाऽऽमव्रणभूतत्वग्दोषघ्नम्** ( ध. ६.४९७ )
माणसाचे मूत्र. **गुण**—कडु, खारट, उष्ण, रूक्ष, रोचन, पित्तकफवातशामक, रक्तपित्त–कृमि–मोह–विष–आम व्रण–त्वचादोषनाशक आहे.

**मानुषीपयस्**—न., दुग्ध० नारीस्तन्यम्, तद्गुणाः—मधुरं, कषायं, शीतं, स्निग्धं, लघु, स्थैर्यकरं, चक्षुष्यं, बल्यं, जीवनं, बृंहणं, तर्पणं, दीपनं, पाचनं, रुच्यम् ( ध. ६.१७५ ) सात्म्यं, स्नेहनं, रक्तपित्ते नावनं, अक्षिशूलिनां तर्पणम्
( चसू. २७.२२४ )

स्त्रीचे दूध. **गुण**—मधुर, तुरट, शीत, स्निग्ध, लघु, स्थैर्य करणारे, डोळ्यांना चांगले, बलकर, जीवन, पौष्टिक, तृप्तिकर, दीपन, पाचन, रुच्य. डोळ्यात शूल होत असताना त्यावर घालून डोळा भरण्यास उपयुक्त.

**मान्द्य**—न., मन्दता, क्षयः ( चसू. ७.४९ )
मंदता, क्षय.
न., जठराग्निमन्दता ( र. १५.४३ ) अग्निमांद्य.

**माया**—स्त्री., परबन्धनबुद्धिः ( (ड) सुक. १.९ )
माया, प्रेम, दुसऱ्याच्या बंधनात असण्याची बुद्धि.

**—फल**—न., वनस्पति० तद्गुणाः—कटु, उष्णं, शैथिल्यसंकोचकं केशकाष्ण्र्यकरम्, वातहरम्
( रा. ६.२२ )

हिं.—माजुफल.
**म.—मायफळ.**
गु.—मैफळ.
बं.—माजुफल.
मायफळ–गुण–तिखट, उष्ण, शैथिल्य नाहीसे करणारे, संकोचन करणारे, केसाना काळे करणारे, व वातनाशक आहे.

**मायि**—वनस्पति० मायाफलम् (रा. ६.२२) मायफळ.

**—फल**—न., वनस्पति० मायाफलम् (रा. ६.२२) मायफळ.

**मायिका**—स्त्री., वनस्पति० मायाफलम् ( रा. ६.२२ ) मायफळ.

**मायूर**—वि., मयूरस्येदम्, मयूरसम्बन्धि (चसू. १३.८३) मोराचे ( मांस इ० )

**( मायूरी )**—स्त्री., विद्या० लघुमायूरी सप्तशती
( इन्दु. असंउ. १ )
मायूरी नावाचा पाठ आरोग्यरक्षणार्थ केला जातो. बौद्धसंप्रदायाची ही विद्या आहे. वैदिकसंप्रदायाची सप्तशती ही आहे.
स्त्री., वनस्पति० अजमोदा (र. ६.१५१ ) ओवाप्रकार.



**—घृत**—न., घृतयोग० मयूरं पक्षपित्तान्त्रशकृत् तुण्डाऽङ्घ्रिवर्जितं दशमूलादिभिर्जले पक्त्वा तस्मिन् क्षीरसमं घृतप्रस्थं पचेत; तदूर्ध्वजत्रुगदेषूपयुक्तम्
( चचि. २६.१६३-६४ )
या नावाचे सिद्ध तूप. मोराचे पंख, पित्त, आतडी, विष्ठा, चोच, पाय काढून बाकीचे शरीर दशमुळा-बरोबर पाण्यात कढवून त्यात समभाग दूध असलेले ६४ तोळे तूप तयार करावे. गळसरीच्या वरच्या रोगात उपयुक्त.

**मारक**—न., खनिज० हिङ्गुलम् ( रा. १३.४८) हिंगूळ.

**मारण**—न., संस्कार० भस्मकरणम्, सर्वलोहानां पारद-भस्मना मारणं श्रेष्ठम्, मूलीभिर्मारणं मध्यमम्, गन्धकादिभिश्च मारणं कनिष्ठं भवति । अरिलोहेन तु मारणं दुर्गुणप्रदं भवति ( र. ५.१६ )
धातूंचे भस्म करणे.
पाऱ्याच्या भस्माच्या सहाय्याने केलेले धातूंचे भस्म श्रेष्ठ. मुळांनी मध्यम, गंधकादिकांनी कनिष्ठ व शत्रुरूप धातूने केलेले भस्म दुर्गुणप्रद होय.

**मारिचक**—वि., मारिचसंस्कृतम्, संस्कृतमिति सूत्रेण मरिचकैः संस्कृतमित्यर्थे मारिचकम्
( चचि. २४.२३ ) मिऱ्याचा संस्कार असलेले.

**मारिष**—शाक० फञ्जीचिल्लयादिगणोक्तः, श्वेतरक्तभेदेन स द्विधा । तद्गुणाः—मधुरः शीतवीर्यो गुरुर्विष्टभ्य-जरणशीलो रूक्षः पुरीषभेदनश्च ( चसू. २७.१००; असंसू. ७.१३९ ) रक्तमारिषो नातिक्षारमयः सरः श्लेष्मलः स्वल्पदोषः कटुपाकी च ( र. २८.९१ )
मारिष–पांढरा आणि तांबडा. तांदुळजा. माठ. पांढरा माठ–त्याचे **गुण**—मधुर, शीत, गुरु, पोट फुगवून नंतर जिरणारा, रूक्ष, पुरीषभेदन आहे. तांबडा माठ–अति क्षारयुक्त नाही, सारक, पचना-नंतर तिखट, थोडा दोष असलेला कफवर्धक.
**तण्डुलीयभेदः** ( हर. २८.९१ )
तांदुळज्याचा भेद–प्रकार.

**मारीच**—पु., ऋषि० कश्यपः रोगापहरणचिन्तनार्थं हिम-वतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः ( चसू. १.१२; ( का भोजनकल्प. )
मारीच ऋषि. रोगोपायांच्या विचारार्थ एकत्रित आलेल्या महर्षींतील एक.
न., वनस्पति० कक्कोलम् ( ध. ३.३७; रा. १२.६९ ) कंकोल.

**–पत्रक**–पु., वनस्पति० **सरलः** ( ध. ३.७८ )
सरळ देवदार.

**मारीचि**–पु., ऋषि० **मरीचेरपत्यं पुमानिति मारीचिः कश्यपः** ( चशा. ६.२१ )
मरीचाचा पुत्र म्हणून मारीच हे काश्यप ऋषीचे नाव.

**मारीष**–पु., **पत्रशाक० मारिषः** ( र. १२.१२९ )
तांदुळजा, माठ.

**मारुत**–पु., **दोष० वातः** ( चसू. १.५९; अहृसू. १.१५ )
वात, वायु.
**शमनचिकित्सा० वायुसेवनम्** ( असंसू. २४.९; अहृसू. १४.७ )
वायूच्या सेवनाने शरिरातील रोग घालविण्याचा किंवा दोषशमनाचा उपाय.

**–ज**–वि., **वातजम्** ( सुउ. ५५.२० )
वातापासून झालेले ( रोग ).

**–पर्यय**–पु., **नेत्ररोग० वातपर्यायः** (सुउ.१.३०-३१)
एक नेत्ररोग.

**–प्रकृति**–वि., **वातप्रकृतिः** ( सुशा. ४.६४-६६ )
वाताची प्रकृति.

**–मूढता**–स्त्री., **वातस्य प्रतिलोमता** ( अरु. ) **वायोर्विमार्गगतिः** ( हे. अहृसू. ८.३० )
वायु विरुद्ध मार्गाने जाणे. योग्य मार्गात वात अडणे व दुसरीकडे जाणे.

**–रोगिन्**–वि., **वातव्याध्यातुरः** ( अहृसू. १६.९ )
वातव्याधीने पीडित.

**–सङ्ग**–वि., **लक्षण० वातावरोधः** ( चसि. ३.६० )
वाताचा अवरोध.

**मारुतापह**–पु., **वनस्पति० वरुणः** ( ध. ५.११९ )
वायवर्णा.

**मारुतार्त**–वि., **वातव्याधिपीडितः** ( चसू. १६.१० )
वातव्याधीने पीडित.

**मारुताशय**–पु., **वाताशयः** ( चचि. २१.४६ )
वाताशय, वाताचे स्थान.
**पक्वाशयाधःशरीरम्** ( चक्र. चचि. २१.४६ )
पक्वाशयाच्या खालील सर्व शरीर.

**मार्कण्डी**–स्त्री., **वनस्पति० भार्ङ्गी** ( र. १७.२९ )
भारंगमूळ.
**भूम्याहुल्यम्** (र.१७.२९) भारंग मूळ. भुईतरवड.

**मार्कण्डीय**–न., **वनस्पति० भूम्याहुल्यम्** (रापरि. ४.३६)
भारंग मूळ, भुईतरवड.

**मार्कण्डेय**–पु., ऋषि० **रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः गर्भांगसम्भवविषये विवदमानानामेकः** ( चसू. १.९; सुशा. ३.३२ )
मार्कण्डेय ऋषि. रोगोपचारचिंतक. हिमालयाचे परिसरात जमलेल्या ऋषींपैकी एक. गर्भाचे प्रथम कोणते अंग उत्पन्न होते या विषयी चर्चा करणाऱ्या ऋषींपैकी एक.

**मार्कव**–पु., **वनस्पति० भृङ्गराजः** ( चवि. ७.२१; सुचि.७.२४;ध.४.११;र.११.४८) माका, भांगरा.

**मार्ग**–पु., **शरीरच्छिद्र० स्रोतः** ( चवि. ५.९; असंशा. ६.५० ) स्रोतस्, शरिरातील सर्व मार्ग.
**रोगमार्गः, बाह्यमध्याभ्यन्तरभेदेन त्रयो रोगमार्गाः** ( असंसू. २२.१५ )
तीन प्रकारचे रोगमार्ग. बाह्य, अभ्यंतर आणि मध्यम.
**मकरादिराशिपरिच्छन्न आकाशभागः रवेः मार्गः** ( असंसू. ४.७ )
सूर्याचा आकाशांतील मार्ग. मकर कुंभ इत्यादी राशींनी युक्त.
**वनस्पति० अपामार्गः** ( र. २०.२२२ ) आघाडा.
वि., **मृगस्येदं मार्गम् मृगसम्बन्धि** ( चचि. १९.७४; सुशा. ३.२७ )
मृगासंबंधी ( कातडे, शिंग इ० )

**–ग**–वि., **मार्गेण गच्छन्** (चवि.५.९) मार्गाने जाणारा.

**–परिगृहीत**–वि., **मार्गसम्बद्धः सूर्यो वायुः सोमो वा** ( चसू. ६.५ )
मार्गाशी संबंधित सूर्य, वायु अथवा चंद्र.

**–विशोधन**–न., **यन्त्रकर्म० मूत्रपुरीषसङ्गे स्रोतःशोधनम्** ( सुसू. ७.१७ )
मार्ग मोकळा करणे. मूत्रपुरीष यांचा अवरोध असताना.
वि., **मूत्रनाडीव्रणादिमार्गाणां शुद्धिकरम्** ( सुसू. ४२.१०(३) )
मूत्रमार्ग नाडीव्रण वगैरेच्या मार्गाची शुद्धि करणे.

**–विहित**–( परिव० ) वि., **विधिविहितम्** ( चसू. १६.२६ ) शास्त्राने सांगितलेले.

**–शुद्धि**–स्त्री., **यन्त्रकर्म० स्रोतःशुद्धिः** ( अहृसू. २५.४१ ) स्रोतसांची शुद्धि.

**–शोधन**–न., **यन्त्रकर्म० मार्गविशोधनम्** (असंसू. ३४.२०) यन्त्रकर्म, व्रणाचा मार्ग शोधणे.

**-स्थ-** **स्रोतोगतम्** ( असंशा. ६.५१ )
स्रोतसात असलेले.

**मार्गावरण-**(परिव०) न., **मार्गावरोधनम्, मार्गरोधः** ( सुचि. ५.७ )
दोषधातुमलांच्या घटकांनी स्रोतसाचा मार्ग अडवणे, मार्गाचा अवरोध. स्रोतोरोध.

**मार्गोपरोध-**पु., **मार्गस्यावरोधः** ( चसू. २६.८२ ) **स्रोतसां रोधः । अयं रसदोषजविकारेष्वेकः** ( सुसू. २.४९ )
मार्गाचा अवरोध स्रोतोरोध. रसदोषांमुळे होणाऱ्या रोगांपैकी एक.

**मार्जन-**पु., **लोध्रभेदः, पट्टिकारोध्रः** ( रा. ६.२४१)
लोध्राचा प्रकार.

**(मार्जनी )-**स्त्री., **गृहमार्जनी** ( असंशा. १२.४ )
कुंचा, केरसुणी.

**मार्जार-**पु., **प्राणि० प्रसहमृग०** ( अहसू. ६.४८ ) **बिडालः, मार्ष्टिमुखम्** ( चसू. २७.३५ ) **दंष्ट्रानखविषोऽयम्** ( सुक. ३.५ ) **अस्य मूत्रपित्तशकृल्लोमनखचर्माण्युन्मादादिषु सेकाञ्जननस्यधूमार्थमुपयुज्यन्ते** (चचि. ९.७४-७५) **अस्य सर्पविषं नातिबाधते** ( सुक. ४.४५ ) **पित्तमस्य सर्वविषहरम्** ( सुक. ५.६८-७३; असंसू. ८.२९ ) **इदं ग्रहचिकित्सायामुपयुज्यते** ( सुउ. ६०-४० )
मांजर; प्राणिविशेष, आक्रमण करून भक्ष्य खाणाऱ्या प्राण्यांपैकी एक. याच्या दाढा व नखात विष असते. याचे मूत्र, पित्त, विष्ठा, केस आणि कातडे यांचा उन्मादादिरोगात काढा करून शिंपडणे, डोळ्यात अंजन, नाकात नस्य आणि अग्नीवर टाकून धूर घेणे यासाठी उपयोग करतात. मांजराला सर्पाचे विष फारसे बाधत नाही. याचे पित्त सर्वविषहर आहे. शिवाय ग्रहबाधारोगातही याच्या सर्व अंगाचा निरनिराळ्या प्रकारे उपयोग होतो.
**गुहाशय० अरण्यबिडालः** ( सुसू. ४६.७२; धपरि. ६) रानमांजर, गुहेत राहाणारे.
**वनस्पति० चित्रकभेदः, रक्तचित्रकः** (रा. ६.१२७)
लाल चित्रक.

**( मार्जारी )-**स्त्री., **सुगन्धि० कस्तूरिका** ( ध. ३.२८ )
कस्तूरी.

**-गन्धिका-**स्त्री., **वनस्पति० मुद्गपर्णी** (ध. १.१३८ )
मुगाच्या पानासारखी पाने असणारी वनस्पती, रानमूग.

**-मुख-**न., **स्वस्तिकयन्त्र० मार्जारमुखसदृशं यन्त्रम्, इदमस्थिनिमग्नशल्योद्धरणार्थमुपयुज्यते** ( सुसू. ७.१० )
मांजराच्या मुखासारखे मुख असणारे स्वस्तिकयंत्र, हाडात रुतलेले शल्य वर काढण्यास उपयुक्त.

**मार्जाली-**स्त्री., **सुगन्धि० कस्तूरिका** ( रा. १२.४६ )
कस्तूरी.

**मार्जित-**वि., **सुघृष्टम्** ( चचि. २ ( २ ) २५ )
चांगले घासलेले.

**मार्तण्डवल्लभा-**स्त्री., **वनस्पति० आदित्यभक्ता** ( रा. ४.१४५ ) सूर्यभक्ता, सूर्यपुष्पी.

**मार्तण्डेश्वर-**पु., **योग० गन्धकताम्रमाक्षिकादिसिद्धः अयं वाताद्यष्टमहारोगश्वासकासक्षयहलीमकपाण्डुसन्निपातज्वरनाशनस्तीव्रदीपनो वन्ध्यत्वनाशनश्च** (र., २१.९६-१०२)
या नावाचे सिद्धौषध. गंधक, ताम्र, माक्षिक इ० युक्त. वातरोगादि ८ महारोग, श्वास, कास, क्षय, हलीमक, पांडु, व सन्निपातज्वरनाशक, तीव्र अग्निदीपक व वंध्यत्व नाशक.

**मार्तिक-**वि., **मृत्तिकाया इदम्, मृत्तिकानिर्मितं वा मृत्तिकाभवम्** ( चचि., १ ( २ ).४ )
मातीपासून बनविलेले. मडके, वीट इत्यादी.

**मार्दव-**न., **मृदुत्वम्** ( चसू. २६.४३ (१); चशा. ४.१४)
मृदुता, मऊपणा.
**सौकुमार्यम्** ( अहसू. ११.३ ) नाजूक. सुकुमारता.

**-कर-** वि., **शरीरकोमलतोत्पादकम्, सौकुमार्यकरम्** ( सुसू. ४६.४३५-४३७ )
शरिरात कोमलता उत्पन्न करणारे, सुकुमारता प्राप्त करून देणारे.

**मार्द्वीक-**न., **आसुत० द्राक्षोद्भवं मद्यम्** ( सुचि. ८.१७ ) **तद्गुणाः-मधुरं कषायानुरसं लघु लघुपाकि सरं शोषविषमज्वरनाशनं च** ( सुसु. ४५.११७-१७३ ) **लेखनं हृद्यं नात्युष्णमल्पपित्तानिलं पाण्डुमेहार्शः-कृमिनाशनं च** ( अहसू. ५.७० )
द्राक्षांचे मद्य. द्राक्षाचे मद्य. त्याचे गुण—मधुर, तुरट, अनुरस लघु व पचनानंतर लघु, सारक, क्षय, विषमज्वर नाशक आहे. दोष खरडून काढणारे, हृदयास हितकर, थोडे उष्ण, अल्पपित्तवातकर, पांडु, प्रमेह, मूळव्याध, कृमि नाशक.

पानक० द्राक्षारसोद्भवम्, तद्गुणाः– श्रमहरं मूर्च्छा-दाहतृषापहं च ( सुसू. ४६.३९० )
द्राक्षाच्या रसाचे पेय. द्राक्षाच्या रसाचे पन्हे. **गुण**—श्रम, मूर्च्छा, दाह, तहान नाशक.

**–शुक्त**–न., आसुत० मार्द्वीकम् ( असंसू. ६.१३६ )
द्राक्षाचा, उसाचा इ० केलेला शिरका.

**मार्ष**–पु., शाक० मारिषः ( असंसू. ७.१३९-१४३ )
तांदुळजा. माठ.

**माल**–न., उपरिभागः ( इन्दु. असंउ. ४४ ) वरचा भाग.

**( माला )**–स्त्री., सुगन्धि० वृक्ष० स्पृक्का ( र. १७.३४ )
पिंडिका.

**मालती**–स्त्री., वनस्पति० पाठा ( ध. १.७० ) पहाडमूळ.
जाती ( चचि. ३०.५९; सुसू. ३८.६४;
असंसू. ३०.१४; ध. ५.१३८ ) जाई.
मालतीनाम्ना प्रसिद्धा काचित् नदी, यत्तीरसम्भवं श्वेतटंकणम् ( रा. ६.३१ )
मालती नावाच्या नदीच्या तीरावर मिळणारे पांढरे टंकण.

**–कुसुम**–न., जातीपुष्पम्, इदं नेत्रयोः स्पर्शनान्नेत्र-शैत्यकरम् ( असंसू. ३३.९ )
जाईचे फूल, हे डोळ्यांना लावले तर डोळे थंड होतात.

**–कोरक**–पु., जातीपल्लवः, अस्य क्षारः श्वित्रे लेपार्थ-मुपयुज्यते ( असंचि. २२ )
जाईची पाने, यांचा क्षार कोडावर लेपाकरिता उपयुक्त.
जातीपुष्पम्, इदं तिमिरेऽञ्जनार्थमुपयुज्यते ( सुउ. १७.३७ )
जाईचे फूल. हे तिमिररोगात अंजनासाठी वापरतात.

**–तीरसम्भव**–न., टङ्कणभेदः श्वेतटङ्कणम्, ( रा. ६.३१ ) पांढरा टांकणखार.

**–पत्र**–न., जातीलतायाः पत्रम्, स्वेदोपयोगिद्रव्येष्वे-कम् ( असंसू. २६.६ )
जाईची पाने. शेकण्याच्या द्रव्यांपैकी.

**–पत्रिका**–स्त्री., वनस्पति० जातिपत्री ( ध. ३.३३ )
जायपत्री.

**–पुष्प**–न., शाक० जातीपुष्पम् (ड. सुचि. ३७.१०१)
सुमनाः (अरु. अहृसू. २४.२१३) इदं शाक-त्वेनोपयुज्यते। तद्गुणाः–तिक्तं मारुतजित् सौरभ्यात् पित्तनाशनं च ( सुसू. ४६.२८६; ( असंसू. १२.८७-८८ )
जाईचे फूल; याची भाजी उपयुक्त. **गुण**—कडु, सुगंधी म्हणून पित्तनाशक, वातहर.

**–फल**–न., वनस्पति० जातीफलम् ( ध. ३.३५ )
जायफळ.

**–रससम्भव**–पु., क्षार० टङ्कणक्षार ( ध. २.२२ )
टाकणखार.

**मालय**–न., वनस्पति० पद्मकः (रा.१२.१४९) पद्मकाष्ठ.

**मालविका**–स्त्री., वनस्पति० त्रिवृत्श्यामा (ध. १.२४३)
काळे तेड.

**मालवी**–स्त्री., वनस्पति० पाठा (रा.६.१००) पहाडमूळ.

**माला**–स्त्री., हार, माळ,

**–कण्ट**–पु., वनस्पति० अपामार्गः ( रा. ४.३८८ )
आघाडा.

**–कन्द**–पु., वनस्पति० तद्गुणाः–सुतीक्ष्णो दीपनो वातश्लेष्माऽपकर्षणो गण्डमालागुल्मघ्नश्च ( रापरि. ७.४४ )
अमरकंद. **गुण**—चांगलाच तीक्ष्ण, अग्निदीपक, वातकफशोधक, गंडमाळा व गुल्मनाशक.

**–गुणा**–स्त्री., लूता० उपपादिका ( असंउ. ४४ )
तद्दंशलक्षणम्–दंशो रक्तो धूमगन्धो विशीर्यमाणश्च भवति। दाहो मूर्च्छा ज्वरश्च जायते (सुक.८.१२७)
तथाऽन्तर्दाहो बहिः शैत्यमाध्मानं मूत्रकृच्छ्रता मूर्च्छाप्रलापाऽतीसारज्वराश्च भवन्ति (असंउ. ४५)
लूता, उपपादिका, हिचे दंशामुळे दंशस्थान लाल, धूमगंधी, मांस फाटते, दाह, ज्वर, मूर्च्छा, हे विकार होतात. तसेच अंतर्दाह, बाहेर थंडी, पोटफुगी, मूत्र कष्टाने होणे, मूर्च्छा, बडबड, अतिसार, ज्वर हे विकार होतात.

**–ग्रन्थि**–स्त्री., दूर्वाभेदः, मालादूर्वा (रा. ८.२३२)
दूर्वांचा प्रकार.

**–तृण**–पु., वनस्पति० भूतृणः (ध. ४.४७)
रोहिसगवत.
न., वनस्पति० भूतृणम् (रापरि. ८.४२)
सुगंधी छत्री.

**–दूर्वा**–स्त्री., दूर्वाभेदः (रा. ८.२३२) दूर्वांचा प्रकार.

**मालालिका**–स्त्री., वनस्पति० स्पृक्का (रा. १२.११३)
पिंडिका.

**मालाली**–स्त्री., वनस्पति० स्पृक्का (ध. ३६२) पिंडिका.

**मालुविटपिन्**–पु., वनस्पति० कुम्भीरः (रापरि. ९.१९)
एक वनस्पती.

**मालूक**–पु., वनस्पति० अर्जकभेदः (रा. १९.८६) आजवला.

**मालूर**–पु., बिल्वफलम् (र. २२.१५७) बेलफळ. वनस्पति० कपित्थः (रा. ११.१५५) कवठ.

**माल्य**–न., पुष्पमाला, पुष्पम् (चक. ३.१२; सुक.५.१२) फूल. फुलांची माळ.

**–परिक्लेशन**–न., लक्षण० पुष्पादिष्वप्रीतिः (चनि. १.३३) फुले वगैरे नकोशी होणे.

**–पुष्प**–पु., वनस्पति० शणः (रापरि. ४.१०) ताग, सण.

**–( पुष्पी )**–स्त्री., वनस्पति० शणपुष्पी (ध. १.२००) ताग. सण.

**–पुष्पिका**–स्त्री., वनस्पति० शणपुष्पी (रा. ४.२९८) ताग, सण.

**माष**–पु., शिम्बीधान्य० स्वेदोपगगणोक्तमेकं द्रव्यम् (चसू. ४.१३; असंसू. १५.२७) अयं शमीधान्यानां हीनतमः (चसू. २५.३९; अहसू.६.२५) श्लेष्मपित्तजननानां श्रेष्ठः (चसू. २५.४०; असंसू. १३.३) विप्रेभ्यो माषदानमशुभस्वप्नापत्तिहरम् (सुसू. २९.७१-७२) तद्गुणाः–वृष्यो वातहरः स्निग्धोष्णो मधुरो गुरुर्बहुमलो बल्यः पुंस्त्वदायी च (चसू. २७.२४) तथा भिन्नपुरीषमूत्रः सन्तर्पणः स्तन्यकरश्च (सुसू. ४६.३४) श्लेष्मपित्तकरः स्वादुपाकः (असंसू. १७.४०) शुक्रवृद्धिविरेककृच्च (अहसू. ६.२१-२२) तथा रक्तपित्तप्रकोपणो रोचनश्च (रा. १६.१५४)
हिं.—उडद, उरीद.
**म.—उडीद.**
गु.—अडद.
बं.—माषकलाय.
त.—उळुन्तु.
फा.—माष.
उडीद. शेंगामध्ये सापडणारे धान्यवर्गातील एक धान्य. घाम आणणाऱ्या द्रव्यसमूहातील एक द्रव्य. पण या जातीतील अति हीन धान्य. अशुभ स्वप्नाचा परिहार करण्यासाठी ब्राह्मणांना उडीद दान द्यावे. **उडदाचे गुण**—शुक्रवर्धक, वातहर, स्निग्ध, उष्ण, मधुर, पचनानंतर गोड, गुरु, अधिक मलोत्पत्तिकर, बलकर, पौरुषत्वदायक, दुग्धोत्पादक, कफपित्तकर, शुक्रवृद्धि व शुक्रविरेचन करणारा आहे. मलमूत्राचा भेद करणारा व पौष्टिक आहे. कफपित्तकर, रक्तपित्तप्रकोपक, रुचकर, मलमूत्र वाढविणारा आहे.
**मान० वल्लद्वयम्** (र. ११.३) **षड्गुञ्जामानम्** (रा. १३.११-१२)
प्रमाण. सहा गुंजाइतके वजन.
**शिम्बीधान्य० राजमाषः** (ध. ६.८४) चवळी.

**–कल्क**–पु., चूर्णितमाषाणामार्द्रा पिष्टिः । अयं शिरोबस्तौ वस्त्रोपरि बद्धे चर्मपट्टे लेपार्थमुपयुज्यते (अहसू. २२.२९)
उडदाची चटणी; पाण्यात भिजवलेले पीठ. शिरोबस्तीच्या वेळी वस्त्रावरून कातड्याच्या सांध्याला लिंपण्यास उपयुक्त.

**–चूर्ण**–न., माषपिष्टम्, इदं सूक्ष्ममुखव्रणप्रपीडनार्थमुपयुज्यते (सुसू. ३७.११) व्रणमुखे विकिरणार्थमुपयुज्यते (अहसू. २७.४८)
उडदाचे पीठ; सूक्ष्म तोंडाच्या व्रणावर दबणे व पचनाकरिता लावण्यास भुरभुरण्या करिता. व्रणाच्या तोंडाभोवती लेप लावून सुकू द्यावा, म्हणजे पिकून तोंड मोठे होते.
**सिराव्यधविधौ असृक्स्थापनाय चोपयुज्यते** (असंसू. ३६.१०)
रक्तस्राव थांबण्यास उपयोगी तसेच शिरेतून रक्त काढण्याच्या विधीतही उपयोगी होतो.

**–पत्रिका**–स्त्री., वनस्पति० माषपर्णी (रा. ३.१७१) रानउडीद.

**–पर्णभृत्**–वि., हरितमाषपर्णानि पोषणार्थं बिभर्ति धारयति खादति वा इति हरितमाषपर्णभृद् (गवादिः) (सुचि. २६.३७)
उडदाचा हिरवा पाला खाऊन राहाणारी गाय इत्यादी.

**–पर्णी**–स्त्री., वनस्पति० जीवनीयवर्गोक्तमेकं द्रव्यम् (चसू. ४.९; असंसू. १५.६; अहसू. १५.८) शुक्रजननगणोक्तमेकं द्रव्यम् (चसू. ४.१२) तद्गुणाः–तिक्ता शीता वृष्या शुक्रवृद्धिकरी बल्या पुष्टिकरी वातपित्तघ्नी रक्तपित्तदाहज्वरनाशनी च (ध. १.१३६) तथा जीवनी स्तन्यश्लेष्मकरी च (सुसू. ३८.३५-३६)
रानउडीद. माषपर्णी. जीवनीयगणातील एक द्रव्य. शुक्रजननगणातील एक द्रव्य. त्याचे **गुण**—कडू, शीत, पुष्टिकर शुक्रवृद्धि करणारे, बलकर वातपित्त-

शामक, रक्तपित्तदाहज्वरनाशक अंगावरचे दूध वाढविणारी व कफ वाढवणारी.
हिं.—माषोणी, वनउडद.
**म.—रानउडीद.**
गु.—जंगली अडद.
बं.—माखानी, माषानी.
त.—पेरुवीट्टुकोकु.

**–पिष्ट**–न., **माषपिष्टिः, इदं शिरोबस्तौ वस्त्रोपरि लेपनार्थमुपयुज्यते** ( असंसू. ३१.१९ )
उडदाचे पीठ. पहा ' माषकल्क '

**–पूपलिका**–स्त्री., **भक्ष्य० माषस्य कृता माषमयी पूपलिका** ( चचि. २४.१२६ )
उडदाची पोळी, भाकरी.

**–मिश्रक**–पु., **माषतण्डुलकृतमन्नम्** (चसू. १३.८९)
उडीद, तांदूळ यांचे मिश्रणाचे तयार केलेले अन्न. ( इडली ).

**–यूष**–पु., **कृतान्न० माषाणां मण्डः, वृष्योऽयम्** ( चचि. २ ( १ ). ४७ ) **आभ्यन्तरमलवर्धनश्च** (असंसू.७.४९ )
उडीदाचे कढण. शुक्र व विष्ठा वाढविणारे.

**–वर्णा**–वि., **माषयूषप्रभा, कृष्णकपिला** ( सुसू. ८.१३ )
उडदाच्या कढणाच्या रंगाची. काळी कपिला.

**–विकृति**–स्त्री., **माषनिर्मितं भक्ष्यादि** ( अहृसू. ३.१२ ) उडदाचे खाण्याचे पदार्थ.

**–विदल**–न., **माषस्य विदलीभूतं धान्यम्, माषदाली** ( चसू. २.३२ ) उडदाची डाळ.

**–षष्टिकपायस**–पु., **कृतान्न० क्षीरचतुर्गुणे विदार्याः रसे माषैः षष्टिकैश्च साधितो घृताढ्यः पायसः। अयमतिवृष्यः** ( चचि., २(३).१४ )
उडीद व तांदुळाची खीर. चौपट भुईकोहळ्याच्या रसात दूध उडीद व साठे तांदूळ यांची पुष्कळ तूप घातलेली खीर, अति शुक्रवर्धक.

**–सूप**–पु., **कृतान्न० माषाणां यूषः, मूलकेन सह माषसूपाभ्यवहारो विरुद्धः** ( असंसू. ९.९; अहृसू. ७.३३ )
उडीदाचे कढण. उडदाचे कढण मुळ्याबरोबर घेणे विरुद्ध आहे.

**माषक**–पु., **मान० अण्डिकाचतुष्टयम्** ( चक. १२.८८; असंक. ८) प्रमाण. चार अंडिका म्हणजे एक मासा.

**शाक० वास्तुलः** ( अरु. ) **तद्गुणाः–रूक्षो ग्राही हिमो गुरुश्च** ( अहृसू. ६.९२ )
एक भाजी. ही रूक्ष, मल बांधणारी, थंड व पचनास जड आहे.

**मास**–पु., न , **काल० शुक्लकृष्णेतिपक्षद्वयात्मको मासः। चैत्रादयो द्वादशमासाः** (सुसू. ६.५; असंसू. ४.५)
महिना, शुक्ल व कृष्ण पक्ष हे दोनहि पंधरवडे मिळून महिना होतो. चैत्र, वैशाख वगैरे बारा महिने आहेत.

**–स्वरूप**–न., **मासानां लक्षणम्** ( असंसू. ४.६३ )
महिन्याचे लक्षण.

**मासानुमासिक**–वि., **मासानुक्रमेण प्रतिमासं दीयमानम्** ( सुशा. १०.५८ )
गर्भस्राव–पात होऊ नये म्हणून सात महिनेपर्यंत द्यावयाचे ( प्रत्येक महिन्याला निराळे ) चूर्ण व पुढे द्यावयाचे सिद्ध दूध.

**मासान्त**–वि., **मासं यावत् मासावसानम्, मासावधिकम्** ( असंशा. ९.२१ ) महिनाभर, एक महिना.

**मासार्धमासस्थ**–वि., **अतीतसार्धमासम् ( अरिष्टादि )** ( चक. ८.१५ ) दीड महिना असणारे.

**मासूरी**–स्त्री., **मसूरदलधारा तन्वी, भेदनानां शस्त्राणां धाराप्रमाणमिदम्** ( ड. सुसू. ८.१०; असंसू. ३४.३५ )
मसुरीच्या डाळीच्या धारेइतकी पातळ. गळू फोडण्याच्या शस्त्राच्या धारेचे हे प्रमाण.

**माहिष**–वि., **महिषस्य महिष्या वा सम्बन्धि** ( चसू. १.१०२; सुसू. ४५.९९ )
म्हशीसंबंधी. म्हशीचे ( दूध, तूप, इत्यादी ).

**–पञ्चक**–न., **महिष्याः क्षीर-दधि-घृत-मूत्र-शकृद्रसाः** ( र. १०.७८ )
म्हशीचे पांच पदार्थ– दूध, दही, तूप, मूत्र शेणाचा रस.

**–बस्ति**–पु., **महिषस्य बस्तिः, अयं बस्तियन्त्रार्थमुपयुज्यते** ( चसि. ३.१० )
म्हशीचा बस्ति ( शारीर अवयव ) बस्तीचे यंत्राला उपयुक्त.

**–रस**–पु., **माहिषमांसरसः, दधिदाडिमसहितो घृताढ्योऽयं परं वृष्यः** ( चचि. २(४).१५-१६ )
म्हशीचे मांसाचा रस. दही, डाळिंबरसासहित पुष्कळ तूपयुक्त दिल्यास अतिशय शुक्र वाढविणारा होतो.

**माहिषाम्बु**–न., **महिषीमूत्रम्, इदं रसकर्मण्युपयुक्तम्** ( र. १०.७८-७९ )
म्हशीचे मूत्र. हे पाऱ्याच्या कर्मात उपयुक्त.

**माहिषाम्ल**–न., **माहिषदधि, माहिषतक्रं वा**
(कागर्भिणीचि.) म्हशीच्या दुधाचे दही किंवा ताक.

**माहेन्द्र**–वि., **आन्तरिक्षं जलम्** ( चसू. ५.६६ ) **इदं राजयक्ष्मणि परिषेकार्थमुपयुज्यते** ( चचि. ८.८६ ) **इदं सर्वेषामनुपानानां श्रेष्ठम्** ( सुसू. ४६.४३४ )
आकाशातून पडणारे पाणी. हे क्षयात शिंपण्याकरिता उपयुक्त. सर्व अनुपानात श्रेष्ठ.

**( माहेन्द्री )**–स्त्री., **वनस्पति॰ इन्द्रवारुणी** ( रा. ३.३७५ ) इंद्रावण.

**–काय**–वि., **सात्त्विकप्रकृतिभेदः, यस्मिन् पुरुषे महाशयत्वं शौर्यमाज्ञा शास्त्रबुद्धिसातत्यं भृत्यभरणमित्येवमादयो दृश्यन्ते स माहेन्द्रकायः** ( सुशा. ४.८२ )
सात्त्विक प्रकृति असणारे व्यक्तीतील प्रकार. महीन्द्र–काय. ज्यांचे शरीर ( आशय ) मोठे, शौर्ययुक्त ज्याची बुद्धि शास्त्रात सतत चालते जो आश्रितांचे पालन करतो, आज्ञा करतो तो महिंद्र काय पुरुष समजावा.

**–सलिल**–न., **आन्तरिक्षोदकम्** ( असंसू. ४.७ )
आकाशातून पडणारे पाणी.

**माहेश्वर**–पु., **सिद्धधूप॰ श्रीवेष्टकदेवदारुहिङ्गुमुस्ताकटुकावचादीनि द्रव्याणि छागमूत्रे मर्दितव्यानि। योगोऽयं धूपनाद् ग्रहपीडाहरः।** (र. २१.६०-६२)
माहेश्वर नावाचा सिद्धधूप. यांत ऊद, देवदार, हिंग, नागरमोथा, कुटकी, वेखंड इत्यादि द्रव्ये आहेत, शेळीच्या मूत्रात खल केलेला धूप. याची धुरी ग्रहबाधाहारक.

**घृतगुग्गुलुबिल्वदेवदामेरुनरुयवयुक्तो धूपः। ग्रहापहोऽयम्** ( काधूपकल्प. )
देवदार आणखी १ प्रकार आणि जव, तूप, गुग्गुळ, बेल, देवदार यांचा तयार केलेला धूप. ग्रहबाधानाशक.

**अगद॰ सगोमूत्राऽजगन्धा सगुग्गुलुर्गृहधूमश्च। योगोऽयं सर्वविषहरः** ( असंउ. ४० )
माहेश्वर या नावाचे धूपाचे औषध; सर्व विषनाशक, तिळवण, गुग्गुळ, घेरोसा यांना गोमूत्राची भावना द्यावी. हा योग सर्वविषहर.

**(माहेश्वरी)**–स्त्री., **वनस्पति॰ शङ्खिनी** ( रा. ३.३८१ )
सांखवेल.

**मित**–वि., **परिमितम्** (असंसू. ३.८८) मोजके, प्रमाणाने.

**मित्र**–पु., **देवता॰ सूर्यः, पायोरधिदैवतम्** ( सुशा. १.७)
सूर्य, देवता, गुदाचे अधिदैवत.
न., **वयस्यः, सुहृद्** ( असंसू. ८.३ )
सुखदुःखात समभागी मित्र, बरोबरीचा स्नेही.

**–विन्दा**–स्त्री., **इष्टि॰ आयुष्कामस्येयमिष्टिर्विहिता** ( असंसू. ९.११५ )
आयुष्याची इच्छा करणाऱ्या व्यक्तींनी आयुष्यप्राप्तीसाठी "मित्रविंदा" नावाचा यज्ञ करावा.

**मिथुन**–न., **मधुसर्पिषी, द्वयम्, यथा मधुसर्पिषोः** ( सुउ. ६५.३४) जोडी, जसे तूप+मध.

**मिथुनीकृत**–वि.,**मिथुनभावापन्नम्, मैथुने सम्यक्संयुक्तम्** ( चशा. २.३ )
जोडलेले, एकत्र आलेले, संभोगाकरिता व्यवस्थित. संयुक्त झालेले, मैथुन चालू असलेले.

**मिथ्या**–अव्य., **असम्यक् अविध्यर्हम्** ( चसू. १.५४ )
अयोग्य, खोटे, गैरशिस्त.

**–प्रणिहित**–वि., **असम्यग्रीत्या प्रणिहितम्** ( चसि. ४.३ )
अयोग्य तऱ्हेने केलेला, ठेवलेला, दिलेला ( बस्ति ).

**–प्रतिकर्मन्**–न., **मिथ्याकृतं वमनादिकं पञ्चकर्म** ( चचि. ५.५ )
पंचकर्मांचा मिथ्यायोग. चुकीच्या विधानाने केलेले पंचकर्म.

**–युक्त**–वि., **असम्यक्प्रयुक्तम् स्नेहवमनादि** ( सुउ. ४०.४ )
अयोग्य तऱ्हेने केलेले स्नेहन, वमन इत्यादीं.

**–योग**–पु., **असात्म्ययोगः** ( चसू. ८.१५ ) **अनुचितो योगः** ( चसू. ११.३९ ) **सम्यग्योगादन्यस्त्रिविधो योगः। मिथ्यातियोगो हीनयोगश्च** ( चसू. ८.३७; अहसू. १२.३६ ) **यथा विकृतबीभत्सरूपादिदर्शनं चक्षुषो मिथ्यायोगः** ( चसू. ८.१५ ) **सेव्यत्वेन निषिद्धविषयस्य सेवनम्। यथा परुषेष्टविनाशादिश्रवणं शब्दस्य मिथ्यायोगः** ( सुउ. ६१.४ ) **क्षयं व्याधिकराणां श्रेष्ठः** (चसू. २५.४०; असंसू.१३.३)
अनुचितयोग. उचित योगाखेरीज दुसरा तीन प्रकारचा योग. मिथ्या ( अनुचित ), अति, व हीन योग. जसे विकृत किळसवाणे रूप दिसणे हा डोळ्याचा

मिथ्यायोग (अनुचित). जे सेवनाला निषिद्ध विषय त्यांचे सेवन करणे, कर्कश शब्द, अगदी जवळचा प्रेमाचा नातेवाईक दिवंगत झाल्याचे ऐकणे हा शब्दाचा मिथ्यायोग. हा व्याधिकर कारणात श्रेष्ठ.

**-विहार**-पु., **अयथाबलमारम्भः** ( सुचि. ५.५ )
शक्तीच्या बाहेरची कामे करणे.

**-संसर्जन**-न., **पेयविलेप्यादीनां मिथ्यायोगः, अविधिप्रयोगः** ( चचि. १३.१२; चनि. १.२८ )
अयोग्य पेयादि सेवन करणे. क्रम सोडून सेवन.

**मिथ्यारम्भ**-पु., मिथ्यायोगः (चक्र.) **अयथाबलं प्रयत्नः** (चशा. १.१०४)
अयोग्य योग. अनुचित बलाचे-शक्ति बाहेरचे काम करण्याचा प्रयत्न.

**मिथ्याहार**-पु., **देशकालप्रकृत्यादिविरुद्धः संयोगविरुद्ध-श्चाहारः** ( सुचि. ५.५ )
देशकाल प्रकृतीच्या विरुद्ध, संयोग. विरुद्ध आहार.

**मिथ्योपचरित**-वि. **असम्यक्चिकित्सितः** ( चवि. ३.३८ ) अयोग्य तऱ्हेने उपचार केलेला.

**भिन्मिण**-पु., **रोग० मिम्मिनः** (सुनि. १.८५) गेंगाणा.

**मिन्मिन**-वि., **मिम्मिनः, अस्पष्टनासागतशब्दोच्चारवान्** ( चवि. ८.८, सुसू. २४.५ )
गेंगाणा, अस्पष्ट असे नाकात बोलणारा.

**मिम्मिण**-वि., **सानुनासिकाऽव्यक्तस्वरः** ( असंशा. २.५४ )
गेंगाणा. अनुनासिक म्हणजे नाकात व अव्यक्त बोलणारा.

**मिम्मिन**-पु., **रोग० सानुनासिकशब्दत्वम्, तल्लक्षणम्-सकफो वायुः शब्दवाहिनीर्धमनीरावृत्य नरान् मिम्मिनांस्तथा मूकगद्गदांश्च करोति** ( चशा. ३.१५; सुनि. १.८५ )
कफासह वायु शब्दवाहिनी, धमनी दुष्ट करून, आवरण करून त्या मनुष्याला गेंगाणा, मुका किंवा घशातल्या घशात अडखळत बोलणारा असा करतो.

**मिलिन्दक**-पु., **सर्प० मण्डलिजातीयः** ( सुक. ४.३४ (२)
एका जातीचा सर्प, घोणस जातीचा.

**मिशि**-स्त्री., **वनस्पति० शतपुष्पा** ( अहृसू. १५.३; र. २२.११०; ध. २.१ ) बडीशेप.
**मिश्रेया** ( ध. २.४ ) बडीशेप.

**मिशी**-स्त्री., **वनस्पति० जटामांसी** ( ध. ३.४५ )
जटामांसी.
**शतपुष्पा** ( र. १६.६७ ) बडीशेप.

**मिश्र**-पु., **वनस्पति० चाणक्यमूलकम्** ( असंक. ३ )
**चाणक्याख्यमूलम्** ( ध. ४.३५ )
चाणक्यमूळ. निर्जल प्रदेशात होणारा जाड व अति मोठा मुळा.

**-पुष्पा**-स्त्री., **वनस्पति० वनमेथिका** ( रा. ५.१८५)
रानमेथी.

**-लोह**-न., **पित्तलं कांस्यं वर्तं चेति धातुत्रयम्** ( र. ५.१-४ )
मिश्रलोह. पितळ, कांसे, भटोर, हे तीन धातु.

**-वर्ण**-पु., **इक्षुभेदः, पुण्ड्रकः** ( रा. १४.१८३ )
पुंड्या ऊस.

**-वर्णफला**-स्त्री., **वनस्पति० वार्ताकम्** (रा. ७.१२८)
वांगे.

**मिश्रक**-पु., **कृतान्न० तण्डुलावरान्नोदनः** (इंदु. असंउ. ४)
तांदूळ व इतर कनिष्ठ अन्न यांचे मिश्रण करून शिजविलेले अन्न.
**पारदभेदः, सर्वधातुगतं तेजो यत्र मिश्रितं तिष्ठतीति मिश्रकः** ( र. १.८९ )
सर्व धातूंमधील तेज जेथे मिश्रित करून राहाते तो मिश्रक ( पारा ).
न., **लवण० औषरकम्** ( रा. ६.५.१ )
मिश्रक नावाचे मीठ.
**वङ्गप्रकारयोरन्यतरत्** ( र. ५.१६१-१६२ )
दोन प्रकारांपैकी एक प्रकारचे कथील.
वि., **अध्यायसंज्ञा० सुश्रुतस्य सूत्रस्थानगतः सप्तत्रिंशत्तमोऽध्यायः, अस्मिन् शोफस्य व्रणस्य च मिश्रयोगाः कथिताः । तथा व्रणषष्ट्युपक्रमेषु विम्लापनाद्यष्टौ उपक्रमा मिश्रीकृत्य कथिताः** ( सुसू. ३७ )
अध्यायाचे नाव. यात व्रणाच्या साठ उपचारांपैकी विम्लापनादि आठ उपचार. हे मिश्र करून दिले आहेत.

**-चिकित्सित**-न., **अध्यायसंज्ञा० सुश्रुत-संहितायां चिकित्सास्थानगतः पञ्चविंशतितमो-ऽध्यायः** ( सुचि. २५ )
अध्यायाचे नाव. कानाच्या पाळीचे रोग, टक्कल, केस पिकणे, पायास चिरण्या पडणे इत्यादी मिश्र रोगाचे उपचार यात आहेत.

–स्नेह–पु., सिद्धस्नेह० त्रिवृत्त्रिफलादन्तीदशमूलानि पञ्चदशपलानि चतुर्गुणे जले पक्त्वा चतुर्भागस्थितं तद्रसं सर्पिरेरण्डतैलं क्षीरं चैकत्र साधयेत्। स्नेहोऽयं कफगुल्मनुत् तथा कफवातविबन्धेषु कुष्ठप्लीहोदरेषु योनिशूलेषु च हितः
( चचि. ५.१४९-१५१; असंचि.१६ )
पैत्तिकोन्मादहरश्च ( चचि. ९.७६ )
मिश्रक स्नेह नावाचे सिध्दौषधाचे नाव. तेड, त्रिफळा इत्यादिकांचा चतुर्थांश काढा, तूप, एरंडतेल, दूध एकत्र कढवावे व स्नेह बाकी ठेवावा. हा कफगुल्म, कफवाताचा अवरोध, कुष्ठ, प्लीहा, उदर, योनिशूल, पित्तज उन्माद यांवर उपयुक्त.

पिप्पल्यामलकद्राक्षाश्यामाभिः पलोन्मिताभिरेरण्ड-तैलसर्पिषोः प्रस्थौ षड्गुणे क्षीरे पचेत्। स्नेहोऽयं गुल्मिनां स्रंसनस्तथा वातव्याधिविद्रधिवृद्धिहरश्च
( असंचि. १६; अहृचि. १४.८९-९० )
मिश्रक स्नेह. प्रकार दुसरा. पिंपळी, आवळा इत्यादी औषधे, एरंडतेल, तूप व यांच्या सहापट दूध यांत कढवून तयार करावा. गुल्मात शोधक वातरोग, गळवे, ( अंतर्बाह्य ) अंडवृद्धिहारक.
कृष्णतिलभल्लातकानां तैले सर्पिश्च प्रत्येकं द्रोण-प्रमाणेन द्रोणत्रयम्, आमलकरसशालसारादिकषायौ च द्रोणद्वयम्, एतेषु कल्कीकृतैस्त्रिफलात्रिकटु-विडङ्गादिभिः स्नेहपाकविधानेन स्नेहं विपचेत्। अयं सर्वकुष्ठनाशकः दीर्घायुर्दः सर्वव्याधिहरश्च
( ड. सुचि. १०.१५ )
मिश्रकस्नेह प्रकार तिसरा. काळे तीळ, बिबा व तूप यात आवळा, राळ इत्यादींचा काढा व त्रिफळा, त्रिकटु इत्यादींची चटणी घालून योग्य विधीने स्नेह तयार करावा. हा सर्व कुष्ठ रोग नाशक व दीर्घायुष्यदायक.

**मिश्रेया**–स्त्री., वनस्पति० तद्गुणाः–तिक्ता स्वादुः ( कटुः ) ( रा. ) हिमा स्निग्धा वृष्या बल्या वातपित्तघ्नी ( कफघ्नी ) (रा.) अर्शःक्षयक्षतक्षीणाऽस्रदोषप्लीहघ्नी तथा जन्तुघ्नी च ( ध. २.४ )
हिं.—सोवा.
म.—शेपू.
गु.—सुवानुं बी.
बं.—सूल्फा.
त.—शटकु पिवराई.
शेपू. गुण—कडु, मधुर, तिखट, थंड, स्निग्ध, वृष्य, बल्य, वातपित्तशामक, अर्श–राजयक्ष्मा–उरः-क्षताने आलेली क्षीणता व प्लीहा रोग नाशक.



**मिसि**–स्त्री., वनस्पति० शतपुष्पा ( सुचि. ३८.४४ )
बडीशेप.

**मिहिका**–स्त्री., सुगन्धि० कर्पूरः ( रा. १२.५६ ) कापूर.

**मीन**–पु., जलचर० मत्स्यः ( र. २८.७७ ) बारीक मासा.
–तैल–न., सिद्धतैल० मीनानां कषायेण रसेन च पक्वं तैलम्, इदं वातव्याधिहरम् ( काधात्रीचि. )
माशाचे तेल. माशाचा काढा व रस यांनी सिद्ध तेल. हे वातरोगनाशक आहे.
–दृश्–स्त्री., वनस्पति०, मीनाक्षी, मत्स्याक्षी, "मीनाख्यायां महाराष्ट्र्यां काकमाच्यां ततः परम्। ब्रह्ममण्डूकिकायां तु मत्स्याक्षी च प्रवर्तते"
( र. १५.७०-७६ )
जलब्राह्मी. मराठी, कावळी.
–नेत्रा–स्त्री., वनस्पति० गण्डदूर्वा ( रा. ८.२३४ )
गण्डदूर्वा.

**मीनाक्षी**–स्त्री., वनस्पति० ब्राह्मी ( द्वितीयब्राह्मी ) ( रापरि. ५.४१ ) ब्राह्मी.
जलब्राह्मी, मत्स्याक्षी ( र. २.२७-२८ ) जलब्राह्मी.

**मीनाण्डी**–स्त्री., इक्षुविकार० शर्करा ( ध. २.१०४ )
एक प्रकारची साखर.

**मीमांस्य**–वि., विचार्यम् ( सुचि. १.७५-७६ )
विचार करण्यास योग्य.

**मुकुन्द**–पु., वनस्पति० शालि० षष्टिकभेदः, वाकस-तृणम् ( चक्र. चसू. २७.१८ ) तद्गुणाः–कषायो मधुरो लघुः शीतः सङ्ग्राही शोषणो वातलः कफ-पित्तघ्नश्च ( चसू. २७.१८ ) तथा रूक्षो लेखना-त्मकश्च ( असंसू. ७.१६-१७; सुसू. ४६.२१ )
अयं सर्वप्राणिभ्यः सामान्यतः पथ्यः ( सुसू. २०५ )
मुकुंद, साठे तांदुळाचा प्रकार **गुण**– तुरट, गोड, हलका, थंड, मळाला बांधीव आकार देणारा, शोषक, वातूळ, कफपित्त नाशक. रूक्ष दोष खरडून काढणारा. हा सर्वांना पथ्यकर.

**मुकुन्दक**–पु., शालि० मुकुन्दः ( चनि. ४.५ )
मुकुन्द साळ.

**मुकूलक**–पु., वनस्पति० दन्ती (चसू. २७.१५७) दाती.
न., फल० औत्तरापथिकमिदम्, दन्तीफलम्, तद्गुणाः–मधुरं स्निग्धं गुरूष्णं बलप्रदं बृंहणं वृष्यं वातघ्नं कफपित्तवर्धनं च ( चसू. २७.१५७ )

**स्वादुपाकरसं विष्टम्भि दाहक्षतक्षयहरं, रक्तपित्तप्रसादनं च** ( अहृसू. ६.१२० )
दातीचे फळ. गुण—मधुर, स्निग्ध, गुरु, उष्ण, बलवर्धक, पौष्टिक, शुक्रवर्धक, वातनाशक, कफपित्तवर्धक आहे. पचल्यावर गोड, अवष्टंभक, दाह—उरःक्षत-क्षयनाशक, रक्तपित्तनाशक.,

**मुक्त**–वि., **प्रत्यासन्नमोक्षः, न तु सर्वथा मुक्तः** ( चक्र. चवि. ८.३७; चशा. ५,२२ )
मोक्षाच्या जवळ गेलेला. पण सर्वस्वी मुक्त नव्हे.
**बन्धनरहितम्, निसृष्टम्** ( चचि. १९.९ )
बंधन नसलेले. मोकळे, बाहेर आलेले, स्थानभ्रष्ट ( गुद ).

**( मुक्ता )**–स्त्री., **रत्न० मौक्तिकम्** ( चचि. १(४).२२; सुसू. ४७.३२९; रा. १३.६६ ) मोती.
**वनस्पति० रास्ना** ( चसू. ४.१८ ) रास्ना.

**–नाल**–वि., **रोगलक्षण० असंवृतगुदः** ( चक्र. चसि. २.१२ ) **मुक्तगुदः** ( चचि. १९.९; असंशा. ११०.१६ )
गुदभ्रंश, बाहेर आलेले गुद, मोकळे गुद, न मिटलेले गुद.

**–बन्धन**–वि., **विसृष्टबन्धनः, बन्धनात् पृथग्भूतः** ( असंशा. ४.२७ )
बंधनातून मोकळा झालेला. निर्बंध. बंधनमुक्त.

**–(बन्धना)**–स्त्री., **वनस्पति० वार्षिकी** (ध. ५.१३६)
तीन पुटे, तीन कडा युक्त वर्षा ऋतूत होणारी सुगंधी वनस्पती.

**–बन्धा**–स्त्री., **वनस्पति० वार्षिकी** (रा. १०.२२९ )
पहा 'मुक्तबंधना'.

**–वेग**–वि., **विसर्जिता वातविण्मूत्रादिवेगा येन सः** ( असंसू. ३.४१ )
वात, मूत्र, विष्ठा इत्यादी वेग ज्याने विसर्जित ( पुरे ) केले आहेत तो. मलमूत्र वाताचे शरिरातून ज्याने विसर्जन केले आहेत तो.

**–सन्धानबन्धन**–वि., **लक्षण० मुक्तसन्धिबन्धनम्** ( चक्र. चसि. १२.३ ) संधिबंधन मुक्त झालेला.

**–सार**–न., **आसुतम्, सूक्तम्** ( ध. ६.२४६ )
आंबट शिरका. आसव.

**मुक्ता**–स्त्री., ( चसू. ६.३१ ) **मौक्तिकम्**; मोती.

**–पुष्प**–पु., **वनस्पति० कुन्दः** ( रा. १०.२५६ )
कुन्दफूल.

**–फल**–न., **रत्न० मौक्तिकम्** (रा, १३.६७; र. ४.६)
मोती.

**–लेप**–पु., **उपक्रम० कल्प० मौक्तिकानामालेपः, विषजन्यशोथदाहतोदज्वरापहः** (चचि. २३.१९९)
मोत्यांचा लेप. विषाने आलेली सूज, आग, टोचणी, तापनाशक.

**मुक्ताभा**–स्त्री., **वनस्पति० मल्लिका** ( रा. १०.२२७ ) ( रापरि. १०.२३ ) मोगरी.

**मुक्तिका**–स्त्री., **रत्न० मौक्तिकम्** ( रा. १३.६७ )
मोती, मौक्तिक.

**मुख**–न., **कारणम्, " मिथ्यायोगो व्याधिमुखानाम् "** ( असंसू. १३.३ )
कारण. जसे व्याधी होण्याच्या मुखास म्हणजे कारणात मिथ्यायोग श्रेष्ठ.
वि., **प्रधानम्** ( सुचि. २४.१३३ ) प्रमुख.
**संस्कार०स्वर्णरौप्योत्पादनार्थं पारदे चतुःषष्ट्यंशेन बीजस्य नाम शुद्धयोः स्वर्णरूप्ययोरन्यतरस्य प्रक्षेपणम्** (र. ८.७६–७७ )
पाऱ्याचा संस्कार. पाऱ्यात चौसष्ठाव्या हिश्श्याइतके बीज म्हणजे शुद्ध सोने किंवा रुपे घालणे व पचवणे.
**अनुयन्त्र० आननम्** ( अहृसू. २५.४० )
मुख, तोंड, एक अनुयंत्र.
**शारीर० आननम्, हनुतः कपालान्तो भागः तत्प्रमाणम्—द्वादशाङ्गुलोत्सेधं चतुर्विंशत्यङ्गुल-परिणाहं च** ( चवि. ८.११७ )
तोंड. हनुवटीपासून कवटीच्या शेवटच्या कडेपर्यंतचा भाग. बारा अंगुळे उंची व चोवीस अंगुळे घेराचा.
**शिरःप्रत्यङ्ग० आस्यम्, वदनम्, मुखकुहरम्, तत्प्रमाणम्—चतुरङ्गुलिविस्तारम्** (ड. सुसू. ३५.१२)
**ओष्ठौ दन्तमूलानि दन्ता जिह्वा तालु गलः सर्वाणि चेति सप्त मुखरोगाणामायतनानि** ( सुनि. १६.३ )
पोकळी असलेले मुख, तोंड डोक्याचा भाग विस्तार चार अंगुळे. ओठ, दाताची मुळे, दात, जिव्हा, ताळु, गळा ही सात मुखरोगाची स्थाने—(घरे) होत.

**–कर**–वि., **ग्रासग्रहणशीलस्तीव्रबुभुक्षः-पूर्वसंस्कार-जनितदोषरहितः** ( र. ११.४७ )
तीव्र बुभुक्षित पारद ग्रास घेण्यासाठी उद्युक्त. पूर्वीच्या संस्कारांनी दोष रहित झालेला. ( पारा ).

**–गन्धक**–पु., **वनस्पति० पलाण्डुः** ( रा. ७.१०० )
कांदा.

**–दूषण**–पु., वनस्पति० पलाण्डुः ( ध. ४.७१ ) कांदा.

**–दूषिका**–स्त्री., क्षुद्ररोग० **तरुणानां मुखे कफमारुतशोणितैः शाल्मलीकण्टकाकाराः सरुजो घना मेदोगर्भाश्च पिडका जायन्ते, ता मुखदूषिकाः** ( सुनि. १३.३९; असंउ. ३६ )
मुरुम, बुरम्या, तारुण्य पिटिका. तरुणांच्या तोंडावर कफवात व रक्त यांनी सावरीच्या काट्यासारखा आंत घट्ट मेद असलेल्या वेदनायुक्त होणाऱ्या पुळया.

**–धावन**–न., उपक्रम० **कषायकवलग्रहगण्डूषादिभिराननप्रक्षालनम् । अनेन मुखबोधनमरोचकहानिश्च भवति** ( ड. सुउ. ५३.८; सुउ. ५७.१३-१४ )
एक उपचार. तोंड धुणे, तुरट गुळण्या चुळा इत्यादींनी तोंड धुणे. याने तोंड स्वच्छ होते व अरुचि नाहीशी होते.
वि., **मुखं धावति शुध्यति अनेन इति मुखधावनं नाम मुखशुद्धिकरम्, मुखधावनार्थमुपयुक्तम्, दार्वीत्वग् यवानी तेजोह्वा पिप्पली तिन्तिडीकं चेति पञ्च मुखधावनाः** ( चचि. ८.१३८ )
मुखशुद्धि करणारी द्रव्ये. दारुहळदीची साल, ओवा, चवक, पिंपळी, चिंच ही पाच तोंड धुवायची द्रव्ये होत.

**–पाक**–पु., लक्षण० **आननस्य पाकः** ( चनि. १.२४ ) तोंड येणे.
**रक्तदोषजविकारेष्वेकः** (चसू. २४.११; सुसू. २४.९) **स पञ्चविधः**– **वातपित्तकफरक्तसन्निपातजभेदात् । तत्र वातजे–सर्वसरोऽनिलो वदनस्यान्तःसञ्चारिणोऽरुणान् रूक्षांश्च व्रणान् करोति । ओष्ठौ ताम्रवर्णौ चलत्वचौ भवतः । जिह्वा च शीतस्पर्शाऽक्षमा गुर्वी स्फुटिता कण्टकैराचिता स्यात् । पित्तजे–दाह ओषस्तिक्तवक्त्रता क्षारसिक्तव्रणसदृशा वेदना च भवति । कफजे–मधुरास्यता कण्डूमत्पिच्छिला व्रणाश्च भवन्ति । रक्तजे–दाह ओषस्तिक्तवक्त्रता क्षारसिक्तव्रणतुल्या वेदना च भवति । सान्निपातिके–सरक्तैर्वातादिभिर्दोषैः सर्वलक्षणानि भवन्ति** ( असंउ. २५ )
हा विकार रक्तदोषज विकारांपैकी एक. वात, पित्त, कफ, रक्त, आणि सान्निपातिक असा पाच प्रकारचा आहे. **वातज**— संचारी वायु प्रकुपित झाल्याने तोंडात लालसर रूक्ष व्रण करतो, ओठ तांबडे व त्यांची कातडी लोंबते, जिभेला थंड स्पर्श सहन होत नाही, ती जड फुटीर काट्यांनी भरलेली होते. **पित्तज**–आग, सर्व बाजूंनी अग्नि लागल्यासारखे वाटणे. कडु तोंड, व्रणावर क्षार लावल्यासारखी वेदना होतात. **कफज**—तोंड गोड. खाज व बुळबुळीत व्रण. **रक्तज**—सर्व लक्षणे पित्ताप्रमाणेच. **सन्निपातज**—सर्व दोष व रक्त यांची सर्व लक्षणे होतात.

**–प्रक्षालन**–न., **आननक्षालनम्, तद्बाह्याभ्यान्तरभेदेन द्विविधम् । तत्रान्तर्मुखप्रक्षालनद्रव्याणि–क्षीरिवृक्षाणां न्यग्रोधादीनां कषायाः क्षीरयुक्ताः । एतेषां गण्डूषकवलधारणादिभिर्मुखगता रोगा नश्यन्ति । बाह्यमुखप्रक्षालनद्रव्याणि-भिल्लोदककषाय आमलककषायः शीतोदकं चेति । अनेन नीलिकामुखशोषपिडकाव्यङ्गानि रक्तपित्तजा रोगाश्च नश्यन्ति** ( सुचि. २४.१५-१७ )
मुखप्रक्षालन. तोंड धुणे. आतून व बाहेरून असे २ प्रकार. तोंड आले असतांना आतून निर्माण झालेला क्षोभ घालविण्यासाठी वड, पिंपळ, पिंपरी वगैरे क्षीरीवृक्षकषाय दूध घालून चूळ व गुळण्या यांकरिता वापरावे, कवल धारण करावे. म्हणजे मुखरोग नष्ट होतात. बाहेरून चेहऱ्यासह तोंड धुण्यासाठी लोध्राची साल किंवा आवळकटी यांचे थंड पाणी वापरावे, म्हणजे चेहऱ्यावरील निळे डाग, शुष्कता पुटकुळ्या, वांग आणि रक्तपित्तविषयक रोग नष्ट होतात.

**–प्रिय**–पु., वनस्पति० **निष्पावः** ( ध. ६.११० ) पावटा.
**नारङ्गः** ( ध. ५.२० ) संत्रे.

**–बाष्प**–पु., **आननगत उष्णो वायुः, अयं वस्त्रोपयोगेन नेत्रस्वेदने उपयुक्तः** ( असंउ. ३१ )
तोंडातून येणारी वाफ. ही कपड्यावर घेऊन डोळा शेकण्यास उपयुक्त.

**–बोधन**–न., **रसनाबोधनम् रुच्युत्पादनम्** ( चसू. २६.७५ )
जिभेला चव आणणारे, रुचि उत्पन्न करणारे.

**–भङ्ग**–पु., **वनस्पति० शिग्रुः** ( ध. ४.४० ) शेवगा.
**शिग्रुभेदः, श्वेतशिग्रुः** ( रा. ७.६४) पांढरा शेवगा.

**–मण्डनक**–पु., **वनस्पति० तिलकः** ( ध. ५.१५८ ) वसंतऋतूत फुले येणारी व नुसती फांदी लावून

ही किंवा जळाल्यावरही उगवणारी छत्रीसारख्या आकाराच्या टिकाऊ फुलांची वनस्पती.

**–मण्डल**–न., **मुखम्** ( काबालग्रहचि. ) तोंड, चेहरा. **मुखमण्डनकारकं द्रव्यम्** ( काबालग्रहचि. ) मुख स्वच्छ करणारे द्रव्य.

**–मण्डिका**–स्त्री., बालग्रह० **रेवती, इयं स्कन्द-परिचारिका** (काबालग्रहचि.) **तज्जुष्टलक्षणम्–पाणि-पादाऽऽस्यरमणीयता कृष्णवर्णाभिः सिराभिरुदरस्याऽऽचितत्वं म्लानाङ्गत्वमुद्विग्नत्वं बह्वाशित्वम्** ( सुउ. २७.१५ ) **अरोचकं ज्वरश्च** ( असंउ. ३ ) **तच्चिकित्सासूत्रम्–कपित्थादिक्वाथेन परिषेकः भृङ्गवृक्षस्वरसबस्तगन्धादिकल्कसिद्धाभ्यां वसातैलाभ्यामभ्यङ्गः, मधूलिकामधुरादि गणसिद्ध-घृतपानम्, वचाकुष्ठसर्पिरादीनां धूपः, चाष-सर्पादिजिह्वानां धारणम्, सपुरोडाशपायसेन च गोष्ठमध्ये बलिदानम् गायत्र्यभिमन्त्रितजलेन गोष्ठे शिशुस्नपनम् रक्षामन्त्रेण च बालरक्षार्थं तद्ग्रहस्तवनम्** ( सुउ. ३५.२-९ )
रेवतीग्रह. ही स्कंदाची अनुचरसेविका आहे. हिच्या बाधेमुळे मुखमंडिका नावाचा होणारा बालरोग. यामध्ये चेहरा, हात पाय तजेलदार दिसतात. पोटावर काळ्या सिरांचे जाळे उठते, अंग कोमजते मूल उदास होते, फार खाते, ज्वर व अरुचि असते. **चिकित्सा**—कपित्थादि काढ्याने परिषेक, माका वगैरेच्या कल्पाने सिद्ध अशा वसा तैलाने अभ्यंग, मधुरगणात सिद्ध केलेले तूप पाजावे; वेखंड-कोष्ठ-तूप यांचा धूप द्यावा. याशिवाय धार्मिक विधी करणे. चाष, सर्प इत्यादिकांच्या जिभा ताईतात भरून गळ्यात बांधावा. गायत्रीमंत्राने मंतरलेल्या पाण्याने गोठ्यात स्नान. यज्ञातील पीठ व दूध यांनी गोठ्यात बळी देणे. मंत्रांनी ग्रहाची स्तुती करणे.

**–मण्डिकाप्रतिषेध**–पु., **अध्यायसंज्ञा०** ( सुउ. ३५ ) या नावाचा अध्याय. यात ग्रहबाधेच्या उपचारांची माहिती आहे.

**–मण्डिता**–स्त्री., बालग्रह० **मुखमण्डिका** ( असंउ. ३ ) बालकांना ग्रहपीडारोग.

**–मण्डितिका**–स्त्री., बालग्रह०**मुखमण्डिका** (असंउ.३) बालकांना ग्रहपीडेचा रोग.

**–मात्रम्**–(अव्य.) **प्रधानमात्रम्** ( सुचि. २४.१३३ ) प्रधानच, मुख्यच.

**–माधुर्य**–न., लक्षण० **मुखस्य मधुरत्वम्** ( चनि. ६.१३; चनि. १.२७ ) तोंड गोड होणे. रोग० **विंशतिश्लेष्मविकारेष्वेकः, मुखे मधुररसप्रतिपत्तिः** ( चसू. २०.१७; असंसू. २०.१५ ) मुखमाधुर्य, एक विकार. तोंड गोड होणे.

**–रागकरी**–स्त्री., वनस्पति० **ताम्बूली** ( धपरि. ३.१ ) विड्याचे पान. तोंड रंगवणारी वनस्पती.

**–रोग**–पु., **मुखे समुद्भूतो व्याधिः, चत्वारो मुख-रोगाः, वातपित्तकफसन्निपातभेदात्** ( चसू. १९.३ ) **तल्लक्षणानि–तत्र वातजे–शोषः कार्कश्यं रौक्ष्यं चलाश्च रुजो भवन्ति। तथा मुखतः शीतं कृष्णाऽरुणं निष्पतनं, प्रस्रंसन–स्पन्दन–तोद–भेदाश्च भवन्ति। पित्तजे–तृष्णाज्वरस्फोटकताल्लुदाहा धूमायनमवदीर्णता तथा मूर्च्छा विविधा रुजः शुक्लारुणवर्ज्या वर्णाश्च भवन्ति। कफजे–कण्डूर्गुरुत्वं सितविज्जलत्वं स्नेहोऽरुचिर्जाड्यं कफप्रसेक उत्क्लेशोऽग्निमान्द्यं तन्द्रा मन्दा रुजश्च भवन्ति। सन्निपातजे–वातपित्तकफजोक्तानि सर्वाणि लक्षणानि भवन्ति** (चचि.२६.११-९२२) **चरके–संस्थानदूष्याऽऽकृतिनामभेदाच्चतुःषष्टिर्मुखरोगाः। संस्थानमोष्ठादि, दूष्यं रक्तादि, आकृतिर्लिङ्गम्, नाम च शीतादादि** ( चचि. २६.१२२ ) **सुश्रुते–पञ्चषष्टिर्मुखरोगाः, सप्त मुखाङ्गानि, तत्र जायमाना व्याधयः पञ्चषष्टिः। तत्रौष्ठयोरष्टौ, दन्तमूलेषु पञ्चदश, दन्तेष्वष्टौ, जिह्वायां पञ्च, तालुनि नव, कण्ठे सप्तदश, सर्वायतनेषु च त्रय इति पञ्चषष्टिः** ( सुनि. १६.१-३ ) **अष्टाङ्गसङ्ग्रहे–पञ्चसप्तति-र्मुखरोगाः, अष्टौ मुखाङ्गानि, तत्र जायमान-व्याधयः पञ्चसप्ततिः। तत्रौष्ठयोरेकादश, गण्डे एकः, दन्तेषु दश, दन्तमूलेषु त्रयोदश, जिह्वायां षट्, तालुन्यष्टौ, गलेऽष्टादश, सर्वाऽऽस्ये चाऽष्टौ, इति पञ्चसप्ततिः** ( असंउ. २५ ) **बालमुखरोग-लक्षणानि–अत्यर्थं लालास्रावः स्तन्यद्वेषाऽरतिर्व्यथा-स्तथा पीतक्षीरोद्गमनम् नासयैव श्वासोच्छ्वासश्च भवति** ( कासू. २५.८ ) **असाध्यमुखरोगा एकोन-विंशतिः–मांसजरक्तजत्रिदोषजाश्चेति त्रय ओष्ठ-प्रकोपाः, त्रिदोषजदन्तनाडी सौषिरश्चेति द्वौ दन्त-मूलगतौ, श्यावदन्तदालनभञ्जनाश्चेति त्रयो दन्त-गताः, अलासो जिह्वागतः, अर्बुदं तालुगतम्, स्वर-घ्नवलयवृन्दबलासविदारिकागलौघमांसतानशतघ्नी-**

**रोहिण्यश्चेति नव गलगता इत्येकोनविंशतिः** ( सुचि. २२.७७-८१ )

मुखरोग. हे चार प्रकारचे. वात, पित्त कफ व सान्निपातिक. त्यांचे होण्याचे ठिकाण, दूष्य, रोगाचे स्वरूप यावरून ६४ मुखरोग चरकसंहितेमध्ये सांगितले आहेत. सुश्रुतसंहितेमध्ये ६५ सांगितले आहेत. अष्टांगसंग्रहामध्ये ७५ मुखरोग सांगितले आहेत. असाध्य मुखरोग १९ आहेत.

तोंडात उत्पन्न झालेला रोग. **लक्षणे**-वातज-शोष, कर्कशता, रूक्षता, अनियमित स्वरूपाच्या वेदना, तोंडातून थंड-काळसर-तांबूस स्राव, सांधे निखळणे, तोंडावर स्फुरण होणे, टोचणी व फूट. **पित्तज**-तहान, ज्वर, फोड, टाळूची आग, घशातून धूर येण्यासारखी वेदना, चिरण्या, मूर्च्छा, नाना प्रकारच्या वेदना, पांढरी व तांबूस खेरीज रंगाच्या छटा. **कफज**-खाज, जडपणा, पांढरे व बुळबुळीत स्निग्धता, रुचि नसणे, हालचाल कमी होणे, कफस्राव, घशाशी येणे, अग्निमांद्य, झापड, व मंद वेदना. **त्रिदोषज**-वरील सर्व लक्षणे. चरकात जागा दूषित, धातु, आकृति व नाव अशा भेदांनी ६४ प्रकार आहेत. जागा-ओठ, कोठा इ०; दूषित धातु-रक्त इ०; आकृति- चिन्ह व नाव शीताद इत्यादी.

मुखाची ७ उपांगे व त्यात होणारे रोग सुश्रुत व अष्टांगसंग्रहात ८ उपांगात वर्णिलेले.

| अवयव | सुश्रुत | अष्टांगसंग्रह |
|---|---|---|
| ओठ | ८ | ११ |
| दातांच्या मुळात | १५ | १३ |
| दातात | ८ | १० |
| जिव्हेत | ५ | ६ |
| टाळूत | ९ | ८ |
| गळयांत | १७ | १८ |
| सर्व तोंडात | ३ | ८ |
| गाल | ० | १ |
| | ६५ | ७५ |

मुलांच्या तोंडाच्या रोगांची लक्षणे-लाळ गळणे, स्तनपानाचा तिटकारा, बेचैनी, वेदना, प्यालेले दूध ओकणे, नाकानेच श्वासोच्छास होणे, तोंडाने श्वासोच्छ्वास करता येत नाही. असाध्य रोग १९-मांसज-रक्तज-त्रिदोषज ३; ओठाचा प्रकोप ३; त्रिदोषज दंत नाडी व सौषिर हे २; दाताच्या मुळातले-काळा दात, दालन, भंजन हे ३; दाताचे- अलास (जिव्हेचा) टाळूचा अर्बुद, स्वरघ्नादि बरचे गळ्यातले नऊ. हे एकूण १९ असाध्य.

**-रोगचिकित्सित**-न., अध्यायसंज्ञा० (सुचि. २२) या नावाचा अध्याय. मुखरोगाचे उपचार यात आहेत.

**-रोगनिदान**-न., अध्यायसंज्ञा० (सुनि. १६) या नावाचा अध्याय. मुखरोगाची माहिती यात आहे.

**-रोगारि**-पु., **सिद्धौषधि० स्वर्णमाक्षिकतुत्थादिनिर्मितोऽयं योगो मुखरोगनाशनः** (र. २४.७०) मुखरोगारि या नावाचे सिद्धौषध. सुवर्णमाक्षिक मोरचूद इत्यादींनी युक्त. मुखरोग नाशक.

**-वाचिका**-स्त्री., **वनस्पति० अम्बष्ठा** (ध. ३.११६) पहाडमूळ.

**-वादन**-न., (परिव०) **मुखेन चुकचुकादि शब्दकरणम्** (असंसू. ३.९६) तोंडाने चुकचुकणे.

**-वास**-पु., **वनस्पति० भूतृणम्** (रापरि. ८.४४) रोहिस गवत.

**-विकूणन**-न., **मुखनिमीलनम्** ( असंउ. २ ) तोंड बंद करणे.

**-विशोधन**-न., ( परिव० ) **उपक्रम० कण्ठगश्लेष्माऽपकर्षणेन मुखस्य निर्मलीकरणम्** ( सुशा. १०.१२ ) मुखातून कफविशिष्ट चिकटा काढून टाकून तोंड साफ करणे.

**-वैरस्य**-न., **लक्षण० मुखविरसता** ( चनि. १.३३ ) तोंडाला चव नसणे.

**-वैशद्य**-न., **मुखेऽरुच्यादिनाशः** ( चचि. ३.१५८ ) तोंडाची अरुची वगैरे नष्ट होणे.

**-शोधन**-न., **वनस्पति० त्वक्** ( रा. ६.७६ ) दालचिनी.

वि., **मुखगतदोषशोधनः** ( चचि. ८.१३८ ) मुखातील दोषांचे शोधन करणारा.

**-शोधिन्**-पु., **वनस्पति० जम्बीरः** ( रा. ११.१८ ) ईडनिंबू.

**-शोध्य**-न., **वनस्पति० त्वक्** (ध. २.५०) दालचिनी.

**-शोष**-पु., **लक्षण० शुष्कमुखत्वम्** ( चचि., २२.८; चनि., १.२१; असंसू. ३.२९ ) तोंडाला कोरड पडणे.

**अशीतिवातविकारेष्वेकः** ( चसू. २०.११; असंसू. २०.१३ ) ऐशी वातविकारांपैकी एक.

**-शोषहर**-वि., आस्यशोषहरम् (अहृसू. २२.९) तोंडाचा कोरडेपणा घालविणारे.

**-सन्दंशविष**-वि., मुखसंदंशे विषं यस्य सः (सुक. ३.५) ज्यांच्या तोंडाच्या दंशात विष आहे असे.

**-स्राव**-पु., लक्षण० मुखप्रसेकः, लालास्रावः (चसि. २.२१) तोंडातून होणारा स्राव; लाळेचा स्राव. विंशतिश्लेष्मविकारेष्वेकः (चसू. २०.१७) वीस कफविकारांपैकी एक.

**मुखाग्र**-न., मुखस्याग्रम् मुखमेवाग्रं वा (चशा. ७.१४) तोंडाचे टोक किंवा मुख हेच टोक.

**मुखार्चिका**-स्त्री., बालग्रह० स्कन्दस्य परिचारिका, मुखमण्डिका (कावालग्रह चि.) मुखार्चिका. बालरोगांपैकी एक. बालकांना पीडा देणाऱ्या ग्रहांपैकी स्कंदग्रहाची परिचारिका म्हणून असलेला मुखमंडिका नावाचा ग्रह.

**मुखामय**-पु., मुखरोगः (चचि. २६.११९) मुखरोग.

**मुखामोद**-पु., शिग्रुभेदः, नीलशिग्रुः (रा. ७.६२) शेवग्याचा प्रकार, काळा शेवगा.

**(मुखामोदा)**-स्त्री., वनस्पति० सल्लकी (रा. ११.१९६) साळई.

**मुखायाम**-पु., मुखदैर्घ्यम्, तत्प्रमाणम्-चिबुकादारभ्य ललाटान्तं यावद् द्वादशाङ्गुलम् (सुसू. ३५.१२) चेहऱ्याची-तोंडाची लांबी हनुवटीपासून कपाळाच्या शेवटापर्यंत बारा अंगुळे.

**मुखार्जक**-पु., वनस्पति० कुठेरकः (रा. १०.८४) लहान तुळस, आजवला (लहान पानांचा.)

**मुखालु**-पु., स्वनामख्यातः वनस्पति० तद्गुणाः- मधुरः शिशिरो रुचिकृद्वातकृत् पित्तघ्नो दाहशोषतृषापहश्च (रापरि. ७.२२) मुखालु. लांब, जाडा व मोठा कंद. गोड, थंड, रुचकर, वातकर, पित्तघ्न, दाहशोष, तहान नाशक.

**मुखालेप**-पु., उपक्रम० मुखस्याऽऽलेपः स त्रिविधो दोषघ्नो विषघ्नो वर्ण्यश्चेति (असंसू. ३१.१४; अहृसू. २२.१४) उष्णशीतभेदात् स द्विविधः। उष्णो वातकफघ्नः तथा शीतः पित्तघ्नो विषघ्नो वर्ण्यश्च। तत्प्रमाणम्- स च त्रिप्रमाणश्चतुर्भागत्रिभागार्धाङ्गुलोत्सेध इति (असंसू. ३१.१४; अहृसू. २२.१५) मुखालेपे कृतेऽतिभाष्यहास्यक्रोधदिवास्वप्नादींन्न सेवेत। अन्यथा कण्डूत्वक्शोषपीनसदृष्ट्युपघाता भवन्ति। शुष्कं मुखालेपमार्द्रीकृतमेवापनयेत् अन्यथा च्छविभङ्गो भवति। तदनन्तरमभ्यङ्गः कार्यः। मुखालेपायोग्याः-रात्रिजागरिताऽजीर्णदत्तनस्याऽरुचिहनुग्रहप्रतिश्यायिनश्च (असंसू. ३१.१५) हेमन्तादिऋतुभेदात् तद्द्रव्याणि -कोलमज्जा वृषमूलं शाबरं गौरसर्षपा हेमन्ते। सिंहीमूलं कृष्णतिला निस्तुषा यवा दार्वीत्वक् च शिशिरे। दर्भमूलहिमोशिरमिशिशिरीषतण्डुलाश्च वसन्ते। उत्पलकह्लारदूर्वामधुकचन्दनकुमुदानि च ग्रीष्मे। मांसीतगरकालीयकतिलोशीरपद्मकानि च वर्षासु। यष्टीकाशनताऽगरुतालीसपुण्ड्राह्वगुन्द्राश्च शरदि (अहृसू. २२.१८-२१) तद्गुणाः-सम्यक्प्रयुक्तोऽयमकालवलीपलिततिमिरव्यङ्गतिलकादिनाशनस्तथा चक्षुर्बलदो मुखसौन्दर्यवर्धनश्च (सुचि. २४.६५; असंसू. ३१.१५; अहृसू. २२.२३) मुखाचे रोग नाहीसे होण्यासाठी मुखावर जे लेप दिले जातात ते मुखालेप. ते तीन प्रकारचे आहेत. (१) दोषनाशक (२) विषनाशक (३) वर्ण चांगला करणारे. उष्ण व शीत अशा भेदाने त्याचे दोन प्रकार होतात. उष्ण हा वातकफनाशक आणि शीत हा पित्तनाशक, विषनाशक आणि वर्ण चांगला करणारा असतो. तो लेप ¼ अंगुळ जाड, ⅓ अंगुळ जाड, किंवा ½ अंगुळ जाड अशा तीन प्रकारांनी लावावा लागतो. हेमंतादि ऋतूमध्ये निरनिराळी द्रव्ये ह्या लेपासाठी घ्यावयास सांगितली आहेत.
मुखालेप लावल्यावर अतीशय बोलणे, हसणे, रागावणे, दिवसा झोप घेणे, वगैरे वर्ज्य करावीत. असे न केले तर तोंडास खाज, त्वचा कोरडी होणे, पडसे, कमी दिसावयास लागणे वगैरे रोग होतील. वाळलेला मुखालेप काढावयाचा तर तो भिजवूनच काढावा. तसे न केल्यास कांती नष्ट होईल. मुखालेप काढल्यावर तेथे अभ्यंग करणे चांगले. मुखालेप लावण्यास अयोग्य व्यक्ति—रात्री जागरण केलेले, अजीर्ण झालेले, ज्यांच्या नाकात औषध घातले आहे असे, आणि अरुचि, हनुग्रह, पडसे झालेले लोक यानी मुखालेप करू नये. ऋतुभेदपरत्वे मुखालेपासाठी उपयुक्त द्रव्ये. हेमंतऋतूत—बोराचे आठळीतील गर अडुळशाचे मूळ, लोध्र, आणि पांढरे सरसू. शिशिरऋतूत—रिंगणीमूळ काळे तीळ, तुषरहित यव, आणि दारुहळदीची साल. वसंत ऋतूत—दर्भाचे मूळ, चंदन, वाळा, बडीशेप, शिरीष आणि तांदूळ.

ग्रीष्म ऋतूत–निळे कमळ, तांबडे कमळ, दूर्वा, चंदन आणि पांढरे कमळ.

चांगल्या तऱ्हेने मुखालेप लावले तर त्यामुळे अकाली तोंडाला पडलेल्या सुरकुत्या जातील, पांढरे केस होणे थांबेल, डोळ्यापुढे येणारी अंधारी, तोंडावरील वांग, तीळ वगैरे नाहीसे होतात. डोळ्याचे बल वाढते. मुखाचे म्हणजे चेहऱ्याचे सौंदर्य वाढते.

**मुखालेपनशील**–वि., **मुखलेपाभ्यासी**
( अहृसू. २२.२२-२३ ) मुखलेप नेहमी करणारे.

**मुखास्राव**–पु., **मुखे उदकस्रावः कफस्रावो वा**
( सुसू. ४२.९ )
मुखांतून येणारा स्राव, लाळ, कफस्राव, पाण्याचा स्राव–पाणी सुटणे.

**मुखोच्छ्वास**–पु.. ( परिव० ) लक्षण० **मुखेनोच्छ्वासः**
( कासु. २५.३७-३८ ) मुखाने घेतलेला उच्छ्वास.

**मुखोद्धर्षणपिण्डी**–स्त्री., **मुखशुद्धिकरा व्यंजनरूपा**
( असंसू. १०.३८ )
मुखशुद्धि करणाऱ्या चटणीचा गोळा.

**मुख्य**–वि., **औषधीयोग० सर्वसमम्** ( ड. सुउ. ४४.२४ )
औषधी योगात इतर सर्व द्रव्यांच्या समान.
**प्रधानम्, यथा तिलतैलं तैलानाम्** (अहृसू. ५.५५)
प्रमुख. जसे तेलात तिळाचे तेल प्रमुख.

**मुग्धवाच्**–वि., **अस्पष्टवाक्, अव्यक्तवचनप्रवृत्तिः**
( अहृसू. १३.७ )
तोंडातल्या तोंडात बोलणे, अस्पष्ट बोलणे.

**मुचकुन्द**–पु., **वनस्पति० तद्गुणाः—कटुस्तिक्तः कण्ठकरः कफकासत्वग्दोषशोफव्रणपामाविनाशनः**
( रापरि. १०.२५ )
सुगंधीपुष्पवृक्ष– मुचकुंद–तिखट, कडु, कंठ चांगला करणारा, कफ, खोकला, त्वचेचे दोष, सूज, व्रण, खरूजनाशक. पुष्कळ व चांगल्या पानांचा, सुंदर फुलांचा, लाल फळांचा वृक्ष.

**मुचुण्डी**–स्त्री., **यन्त्र० सा ऋजुः श्लक्ष्णा सूक्ष्मदन्ता सक्तद्विभुजा मूले मुद्रिकायुक्ता च। इयं वलयपीडनाद् गम्भीरव्रणमांसानां तथा शेषितस्याऽर्मणश्चाऽऽहरणे उपयुक्ता** ( असंसू. ३४.७.; अहृसू. २५.९ )
मुचुण्डी नावाचे यंत्र. सरळ, गुळगुळीत, लहान दात्यांची, दोन्ही हात पक्के केलेली, व मुळात अंगठीसारखे गोल कडे असलेली असावी. हे कडे तोंडाकडे युक्तीने सरकवून व्रणातील आतले मांस तसेच, शिल्लक अर्मणाचे मांस तोंडाच्या पकडीत पकडून काढण्याकरिता उपयुक्त.

**मुचुलुन्द**–पु., **वनस्पति० कण्टकीमदनः**
( ड. सुचि. १८.१० ) मुचकुंद. पहा 'मुचकुंद'
**मुचकुन्दः** (सुचि.१८.१०) मुचकुंद, सुगंधी वनस्पती.

**मुचूटि**–स्त्री., **प्रमाण० मुष्टिप्रमाणम्, प्रकुञ्चः, पलम्**
( काखिल.३.८८-८९ ) मूठभर, चार तोळे.

**मुञ्चक**–पु., **वनस्पति० मुष्ककः** ( ध. ५.१३२ ) मोरवा.

**मुञ्चुटि**–स्त्री., **तर्जन्यङ्गुष्ठाग्रमात्रग्राह्यप्रमाणम्**
( ड. सुचि. ४०.४६ ) चिमूटभर.

**मुञ्ज**–पु., **वनस्पति० तृण०** ( चसि. २.२२; सुसू. ४५.१८)
**तद्गुणाः–मधुरः शीतः कफपित्तजदोषजिद् विसर्पास्रमूत्रबस्त्यक्षिरोगनुत् पित्तदाहतृषापहः पावनो भूतनाशनश्च** ( ध. ४.१३२ )
मुंज–तृण. मौंजीतृण. **गुण**–गोड, थंड, कफपित्तज दोष जिंकणारे, धावरे, रक्तमूत्र, बस्ति व डोळ्याचे रोग, पित्त, दाह, तहान, भूतबाधा नाशक व पवित्र करणारे.

**–वत्**–पु., **सोम०** ( सुचि. २९.५-८ ) सोम.

**–वलय**–पु., **पञ्चनिक्षेपणान्यतमभूता मुञ्जतृणैर्विरचिता वलयाकारा बृहन्मुद्रिका जलपात्राधारा**
( सुसू. ४५.१८ )
चुंभळ, निवणे. मुंजतृणापासून गोल आकाराचे केलेले. ज्यावर पाण्याचे मडके वगैरे ठेवतात ते. पाण्याचा आधार म्हणून ठेवावयाच्या ५ साधनांपैकी एक.

**मुञ्जनक**–पु., **तृण० मुञ्जः** ( रा. ८.२०४ )
मुंजागवत, मोळ.

**मुञ्जात**–पु., **वनस्पति० कन्द० मुञ्जातकः**
( चचि. २९.६६; सुचि. १७.१५; असंचि २४; अहृसू. ६.८३ )
खारा रानसुरण, मुंजारक, महोदक नावाने काश्मीरकडे प्रसिद्ध कंद. याच्या ऐवजी ताडगोळा घेतात.

**मुञ्जातक**–पु., **वनस्पति० शाक० औत्तरापथिककन्दः, तद्गुणाः– स्वादुः शीतो गुरुः स्निग्धस्तर्पणो बृंहणो वातपित्तहरो बल्यो वृष्यश्च** ( चसू. २७.१२०; सुसू. ३९.९)
मुंजातक, खारा सुरण. **गुण**—गोड, थंड, जड, स्निग्ध, पोषक, पौष्टिक, वातपित्तहर, बलकर, शुक्रपोषक. पहा 'मुञ्जात.'

**मुण्ड**–पु., शालिभेदः, मुण्डशालिः ( रा. १६.७९ )
साळीचा प्रकार.

**( मुण्डी )**–स्त्री., वनस्पति० **तद्गुणाः– कटुस्तिक्ता कषायोष्णा कफपित्तघ्न्यामारुच्यपस्मारगण्डश्लीपदाऽतिसारकासविषच्छर्दिविनाशिनी तथाऽनिलास्रविनाशिनी च** ( ध. १.१६०; र. १३.८२ )
हिं.—छोटी मुण्डी, गोरखमुण्डी.
**म.—मुंडी, बोंडथरा, बरसबोंडी.**
गु.—नदानींमुंडी, बोडियोकलार.
बं.—मुंडीरी, थुलकुडी.
त.—विष्णुकरन्तै.
फा.—सखिमि-इ-ह्यत्.
गोरखमुंडी. **गुण**— कटु, तिक्त, कषाय, उष्ण, कफपित्तशामक, अपस्मार, गण्डमाला, श्लीपद, अतिसार, कास, विष, छर्दीनाशक. वातरक्त नाशक.
न., **भैषज्य० बोलम्** ( रा. ६.११६ ) बोळ.
**लोहभेदः, तन्मृदु-कुण्ठ-कडारभेदेन त्रिविधम्। तद्गुणाः – मृदु कफवातशूलार्शोमेहाऽऽमकामलापाण्डुगुल्मामवातजठरार्तिहरं दीपनं रक्तवर्धनं कुष्ठशोधि शोफापहं च** (र. ५.७८; ध. ६.२७)
लोहाचे तीन प्रकार; मऊ, कुंठ व कडार असा. **गुण**— मऊ, कफवात, शूल, मूळव्याध, प्रमेह, आम, आमवात, कावीळ, पांडु, गुल्म, पोटदुखी, सूज, कुष्ठ नाशक; अग्निदीपक, रक्तवर्धक.

**–चणक**–पु., **शिम्बीधान्य० कलायः** (ध. ६.१०३)
वाटाणा.

**–ज**–न., **लोहभेदः, तीक्ष्णलोहम्** (रा. १३.३०)
पोलाद.

**–शालि**–पु., **वनस्पति० शालि० तद्गुणाः– त्रिदोषघ्नो मधुराम्लो बलप्रदश्च** (रा. १६.८९)
मुण्डशाली. **गुण**— त्रिदोष नाशक, मधुर, अम्ल, बलवर्धक.

**मुण्डनक**–पु., **शालिभेदः, मुण्डशालिः** ( रा. १६.८९ )
साळीचा एक प्रकार. बोडक्याचे भात.

**मुण्डाख्या**–स्त्री., **वनस्पति० महामुण्डी** ( रा. ५.२२० )
मोठी मुंडी.

**मुण्डायस**–न., **लोहभेदः, मुण्डम्** ( रा. १३.२९ )
मुण्डलोह.

**मुण्डिका**–स्त्री., **वनस्पति० मुण्डी** ( र. २.४३ )
गोरखमुंडी, बोंडधरा,

**मुण्डिन्**–पु., **पशु० जङ्गलजातीयः** ( ध. परि. ३.२८६ )
मांड्या पुष्ट असणाऱ्या हरणाची जात.

**मुण्डिनिका**–स्त्री., **वनस्पति० मुण्डी** ( ध. १.१५९ )
गोरखमुंडी.

**मुतोली**–स्त्री., **व्रणबन्ध० बन्धोऽयं मुटिकाकारो बहुच्छिद्रैर्जालवद्बहुरन्ध्रकश्च। बन्धस्यास्य प्रतोली, गोतुण्डिका, चालनीति च नामान्तराणि** ( सुसू. १८.१७-१८ )
मुतोली नावाचा एक बंध. पुष्कळ छिद्रे असलेला, मासे पकडण्याच्या जाळ्यासारखा. शिश्न व मान यांच्या व्रणावर बांधण्याला उपयुक्त. याला प्रतोली, गोतुंडिका, चालनी अशीं दुसरी नावे आहेत.

**मुत्तोली**–स्त्री., **व्रणबन्ध० मुतोली** ( असंसू. ३८.४२; अहृसू. २९.६० )
व्रणबंधाचे नाव. पहा 'मुतोली.'
**पात्र० तृणनिर्मितं पात्रम्** ( अहृक. १.३ )
गवताचे भांडे.

**मुत्सुख**–न., **वनस्पति० ऋद्धिः** ( र. ५.१८८ )
ऋद्धि, अष्टवर्गापैकीं वनस्पती.

**मुदिरफल**–पु., **वनस्पति० विकण्टकः** (रापरि. ११.२०)
विकंटक, मेघ येण्याच्या वेळी विशेषतः मेघगर्जनेने मऊ, गाठाळ, फळांचा बहर येणारे झाड. धमासा.

**मुद्ग**–पु., **शिम्बीधान्य० वैदल० अयं हरितपीतकृष्णरक्तभेदैर्नानाविधः। तत्र हरितः प्रधानः** ( सुसू. ४६.२९; असंसू. ७.२६ ) **शमीधान्यानां श्रेष्ठः** ( चसू. २५.३८ ) **सूप्यौत्तमश्च** ( चसू. २७.२३; असंसू. ७.२६ ) **सर्वप्राणिनां पथ्यः** ( सुसू. २०.५ ) **तद्गुणाः–कषायमधुरो रूक्षः शीतो लघुः कटुपाकी विशदः कफपित्तघ्नश्च** ( चसू. २७.२३ ) **नात्यर्थं वातलो दृष्टिप्रसादनश्च** ( सुसू. ४६.२९; असंसू. ७.२६ ) **संग्राही विबन्धकृन्मेदश्लेष्मास्रपित्तेषु लेपसेकयोर्हितश्च** ( अहृसू. ६.१७ ) **दीपनो रक्तामयमूत्रामयजिच्च** ( ध. ६.८१ ) **हरिन्मुद्गस्तु कषायो मधुरः कफपित्तजित् रक्तमूत्रामयघ्नः शीतलो लघुदीपनः** ( रा. १६.१३१ ) **कृष्णमुद्गस्तु त्रिदोषघ्नो मधुरो वातनाशनः लघुः दीपनः पथ्यो बलवीर्याङ्गपुष्टिदः** ( रा. १६.१३० ) **मुद्गयूषगुणाः–पित्तज्वरार्तिशमनः लघुः संतापहारी, रक्तप्रसादनोऽरोचकनाशनः यदि सैन्धवेन युक्तस्तदा सर्वरुजापहारी** ( रा. १६.१३३ ) द्र० ' मुद्गयूष. '

हिं.—हारिमुं, मूङ्ग.

**म.—मूग.**

गु.—मग.

बं.—मुग.

त.—पच्चैप्पयरु, मुंगु.

फा.—बुनुमास.

मूग. शिंबीधान्यांपैकी एक द्विदल धान्य. याचे हिरवा, पिवळा, काळा, लाल अशा भेदाने अनेक प्रकार होतात. त्यामध्ये हिरवे मूग हे श्रेष्ठ आहेत. **मुगाचे सर्व साधारण गुण**—कषाय, मधुर, रुक्ष, शीत, लघु, कटुपाकी, विशद, कफपित्त नाशक आहेत. फार वातवर्धक नाहीत. दृष्टीला प्रसन्न करणारे आहेत. मळाला घट्ट करणारे, अवष्टंभक, मेद–कफ–रक्तपित्त विकारावर आणि लेप व शेक या कार्यात हितावह. **हिरवे मूग**—कषाय, मधुर, कफपित्त नाशक, रक्त व मूत्रविकार नाशक, थंड, हलके व अग्निदीपक आहेत. **काळे मूग**–त्रिदोषघ्न, मधुर, वातनाशक, हलके, अग्निदीपक, पथ्यकर, शक्ति व वीर्यवर्धक असून अवयवांना पुष्ट करणारे आहेत. **मुगाचे कढण**—पित्तनाशक, आवाजासंबंधी पीडा दूर करणारे, हलके, संताप नाशक, रक्त प्रसादक, व अरुचिनाशक आहे. जर सैंधव घालून हे कढण केले तर सर्वप्रकारची पीडा हरण करणारे असते.

**–पर्णी**–स्त्री., **वनस्पति० जीवनीयगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.९; असंसू. १५.६; अहसू. १५.८ ) **शुक्रजननगणोक्ता** ( चसू. ४.१२ )

**तद्गुणाः—स्वादुः शीता जीवनी बृंहणी वृष्या कफशुक्रवृद्धिकृत् स्तन्यश्लेष्मकरी पित्तघ्नी वातरक्तदाहज्वरकृमिघ्नी च** (सुसू. ३८.३५; ध. १.१३८)

हिं.—मुगवन, माठ मुगानी.

**म.—मुगवेल, रानमूग.**

गु.—जङ्गली मग.

बं.—मुगानी, वनमाषा.

त.—नरिप्पयरु.

मुद्गपर्णी शुक्रोत्पत्तिकर व जीवनीय गणांतील एक. त्यांचे **गुण**– गोड, थंड, जीवन, शक्तिकर, शुक्रवृद्धिकर, शुक्रातील कफ दुष्टिनाशक, पुष्टिकर, दूध आणि कफवर्धक पित्तशामक, वात रक्त दाह ज्वर कृमिनाशक.

**–मण्डोदक**–न., कल्प० **मुद्गमण्डः, इदं कषायतिक्तं कटुपाकिसैन्धवादियुतं सत् कफघ्नम्** (का भोजनकल्प.)

मुगाचा मंड. हा तुरट पचल्यानंतर तिखट, कडू, सैंधव इ० युक्त केल्यास कफघ्न.

**–यूष**–पु., कल्प० **मुद्गसिद्धो यूषः, कण्टकारीरससाधितोऽयं सर्वकासघ्नः** ( चचि. १८.१८४ ) **बहुद्रवो मुद्गकषायो ज्वरे उपयुक्तः** (चचि. ३.१५६-१५७) **चतुर्भागाम्बुसाधितो मुद्गरसो दीपनो हृद्यः कफघ्नः शुध्दानां व्रणिनां च हितः** ( सुसू. ४६.३६७ )

**दाडिमाऽऽमलकसाधितोऽयं संशमनो हृद्यो लघुः प्राणाग्निजननो मूर्च्छामेदोघ्नः पित्तवातजिच्च** ( सुसू. ४६.३७३ ) **पित्तश्लेष्महरश्च** ( अरु. अहसू. ६.३३ )

मुगाचे कढण. काटेरिंगणीच्या काढ्यात केले तर सर्व तऱ्हेचा खोकला नाहीसा होतो. फार पातळ कढण तापात उपयुक्त आहे. चारपट पाणी घालून तयार केलेले मुगाचे कढण अग्निदीपक, हृदयाला हितावह, कफनाशक आहे. डाळिंब, आवळा यांनी केलेले कढण शामक, हृदयाला हितकर, हलका, प्राण आणि अग्नि जनक; मूर्च्छा, मेद, पित्तवात, कफवात नाशक.

**–रस**–पु., **मुद्गयूषः** ( सुचि. १७.४३ )

मुगाचा यूष, कढण.

**–वर्णा**–वि., **हरितमुद्गवर्णा** ( सुसू. १३.१२ )

मुगाच्या रंगाचा, हिरव्या मुगाच्या रंगाचा.

**मुद्गर**– पु., उपयन्त्र० ( सुसू. ७.१५ ) **अनुयन्त्र० काष्ठादिनिर्मितोऽयमस्थिविनष्टशल्यस्य चालनार्थमुपयुक्तः** ( सुसू. ७१५; असंसू. ३४.१८ )

एक उपयंत्र. हाडात दडलेले शल्य चाळवण्यासाठी उपयोगी हातोड्याच्या आकाराचे लाकडी यंत्र. अस्थीत रुतलेले शल्य हलवण्यास उपयुक्त.

**वनस्पति० तद्गुणाः–मधुरः शीतः सुरभिः पित्तप्रकोपहृच्च** ( रापरि. १०.२१ )

मोगरा. गोड, थंड, सुगंधी, पित्तनाशक.

**–फल**–पु., **वनस्पति० कर्मारः** ( रापरि. ११.१३ )

वेळूचे फळ.

**मुद्गरक**–पु., **वनस्पति० कर्मारः** ( रापरि. ११.१३ )

वेळूचे फळ.

**मुद्गल**–न., **वनस्पति० कत्तृणम्** ( रा. ८.१०६ )

रोहिसगवत.

**मुद्गादिजवेसवार**-पु., **मुद्गादिसिद्धं नागरधान्यकादिसंस्कृतं कुट्टितं मांसम्** ( अहसू. ६.४१ )
मूग वगैरे पदार्थ घालून केलेले कुटलेल्या मांसाचे सुंठ, धणे यांची फोडणी दिलेले पदार्थ.

**मुद्गामलकयूष**-पु., कल्प० **मुद्गामलकाभ्यां साधितो यूषः । अयं ग्राही कफपित्ते हितश्च ।**
( सुसू. ४६.३७४ )
कढण. हे मळ घट्ट करणारे कफपित्ताला हितकर.

**मुद्गोलुम्ब**-पु., **खिन्नाः किञ्चिद् भृष्टा मुद्गाः** ( सुचि. २३.१२ ) किंचित भाजलेले मूग.

**मुद्रणी**-स्त्री., भैषज्य० **लाक्षा** ( रा. ६.१४२ ) लाख.

**मुद्रिका**-स्त्री., शस्त्राङ्ग० **भिषक्प्रदेशिन्यग्रपर्वप्रदेशप्रमाणो वलयः, ऊर्मिका** ( सुसू. ८.४; अहसू. २६.१४ )
बोटावर आघात होऊ नये, मार लागू नये म्हणून घालावयाचे आंगठी सारखे कडे, जाड आवरण. यालाच ऊर्मिका म्हणतात.
अलङ्कार० **अङ्गुलीयकम्** ( र. २.१३९-१४० )
आंगठी - दागिना.

**मुनि**-पु., **पुनर्वसुः**, ( इन्दु असंक. ५; अहसू. १.३ )
पुनर्वसु ऋषि.
**कश्यपादयः सप्त** (असंसू. २८.३५) कश्यपादिऋषि.
वनस्पति० **अगस्त्यः** ( र. ११.११० )
आगस्ता. हदगा.
**त्रपुसम्** ( रा. ७.२४६ ) काकडी.
**उर्वारुकम्** ( ध. १.१७६ ) मोठी, जाड काकडी.
**दमनः** ( ध. ३.६४ ) कुंद.
**-खर्जूरिका**-स्त्री., **खर्जूरीभेदः, राजखर्जूरी** ( रा. ११.६८ ) खजूर.
**-च्छद**-पु., वनस्पति० **सप्तपर्णः** ( रा. १२.१३८ )
सप्तपर्णी सातवीण,
**-द्रुम**-पु., वनस्पति० **अगस्त्यः** ( रापरि. १०.१३ )
अगस्ता, हदगा.
**-धान्य**-न., धान्य० **नीवारः** ( रा. १६.१३९ )
सावे, देवभात.
**-प्रिय**-पु., वनस्पति० **व्रीहिः** ( रा. १६.१२० )
तांदूळ.
**(-प्रिया )**-स्त्री., वनस्पति० **व्रीहिः** ( रा. १६.१०९ )
तांदूळ.
**-भक्तप्रसादक**-पु., वनस्पति० **नीवारः** (ध. ६.८७)
सावे, देवभात
**-भक्तप्रसादित**-पु., वनस्पति० **नीवार** (ध. ६.८७)
सावा, देवभात.
**-भक्ष्य**-पु., धान्य० **श्यामाकः** ( ध. ६.८८ )
सावा. वऱ्याचे तांदूळ.
**-मित**-वि., **मुनयः सप्तर्षयः, अतः सप्तसङ्ख्याकम्** ( र. ९.८४ )
सात संख्येचे सर्व. जसे सात ऋषि.
**-श्रेष्ठ**-पु., **प्राचीनो रसाचार्यः** ( र. ६.४९-५३ )
प्राचीन रसशास्त्री.
**-सङ्ख्य**-वि., **सप्त** ( र. ५.१६६ ) सात.
**-मुनीश्वर-मुनिश्रेष्ठः** ( **प्राचीनो रसाचार्यः** ) ( र.९. ६४-६६ )
प्राचीन श्रेष्ठ, ऋषि; रसायनशास्त्री.

**मुपविप्रज्ञविप्रिय**-पु., वनस्पति० **व्रीहिः** ( रा. १६.१०१ ) साठे साळीची जात. तांदूळ.

**मुमुक्षु**-वि., **संसारान्मोक्तुमिच्छुः, सः** ( चशा. ५.१२ ) संसारातून मुक्त होऊ इच्छिणारा.

**मुमूर्षु**-वि., **आसन्नमरणः गतायुः** ( चसि. २.५; चइ.१.२३) आसन्नमरण, मरावयास टेकलेला.
**-लिङ्ग**-न., **रिष्टलक्षणम्, मृत्युसूचकचिह्नम्** ( चवि. ३.४५ ) मृत्युसूचक लक्षण.

**मुर**-न., वनस्पति० **मुरा** ( असंउ. ९ ) मोरवेल.

**( मुरा )**-स्त्री., सुगन्धि० **तद्गुणाः-तिक्ता, कटुः कषाया शीता पित्तकफघ्नी क्षतश्वासरक्तदोषविषदाहभ्रममूर्च्छातृषापहा च** ( ध. ३.६७ )
मोरवेल. ही कडु, तिखट, तुरट, पित्त कफशामक, दाह, भ्रम, मूर्च्छा, तृष्णा नाशक आहे. क्षतक्षीण श्वास, रक्तदोषकर आहे.

**मुरङ्गी**-स्त्री., **शिग्रुभेदः, शोभाञ्जनकः** (ड. सुक. ५.६८; असंचि. १७ ) शेवगा.

**मुरल**-मत्स्य० **नादेयोऽसौ, तद्गुणाः-बृंहणो वृष्यः स्तन्यश्लेष्मकरश्च** ( सुसू. ४६.११६ )
मुरल नावाचा मासा.—नदीतला. पौष्टिक, शुक्रवर्धक, कफकर, अंगावरील दूध वाढविणारा.

**मुरुङ्गी**-स्त्री., **शिग्रुभेदः, सौभञ्जनकः** (इन्दु. असंउ.४२)
एक प्रकारचा शेवगा.
**मधुस्रवा** ( इन्दु ) **मूर्वा** ( असंउ. १० ) मोरवेल.

शिग्रुभेदः, मधुशिग्रु (सुचि. ६.९) गोड शेवगा.

**मुशल**–न., मुसलम् ( असंशा. ३.२३ ) मुसळ.

**( मुशली )**–स्त्री., वनस्पति० तालमूलिका, मुसलीकन्दः ( र.१२.१०९ ) सफेत मुसळी, काळी मुसळी.

**मुष्क**–पु., शारीर० वृषणः ( चचि. ३०.१७५; सुनि. ३.१८; असंशा. ६.४३ ) वृषण, अंड.
**वनस्पति० मुष्कक** ( रा. ११.२२०; र. १७.५२ ) मारवा, मोरवा.

**–कच्छू**–स्त्री., क्षुद्ररोग० वृषणकच्छूः अत्र अहिपूतन-पामावद् उपाचरेत् ( सुचि. २०.६० )
वृषणाची खाज, खरूज.

**–स्रोतस्**–न., स्रोतो० मुष्कस्थितं स्रोतः, शुक्रवह-नाडी ( सुचि. ७.३६ )
मुष्कस्रोतस शुक्रबहनाडी.

**मुष्कक**–पु., वनस्पति० घण्टापाटलकम् ( चक. चचि. १५.१८९ ) कृष्णपुष्पमोक्षकः ( ड. सुसू. ११.११ ) पुष्पमस्य कफपित्तहरं कुष्ठघ्नं शाकोपयोगि च ( सुसू. ४६.२८४ ) श्रेष्ठः क्षार-वृक्षः, शुक्लकृष्णभेदेन द्विविधोऽसौ, तद्गुणाः–कटु-रम्लो ग्राही रोचनः पाचनो वातकफहरो गुल्म-प्लीहोदरघ्नश्च ( ध. ५.१३२ )
हिं.—मोखा, फरवाह.
**म.—मोखा, मोखाडा.**
गु.—मरखो.
बं.—घण्डापारुल.
त.—मोकलिङ्क.
मोखा. क्षारासाठी सर्वोत्कृष्ट वृक्ष. त्याचे काळा व पांढरा असे २ प्रकार आहेत. **त्याचे गुण**—तिखट, अम्ल, मळ घट्ट करणारा, रोचक, पाचक, वातकफ नाशक, गुल्मप्लीहा उदररोगनाशक. फूल–कफपित्त, कुष्ठ नाशक, भाजी उपयुक्त.
न., **कन्दविष०** इदमतितीक्ष्णमाशुप्राणहरं च ( असंउ. ४० )
विषारी कंद हा अति तीक्ष्ण व लवकर प्राणहारक.

**–क्षार**–पु., क्षार० मुष्ककाणां क्षारः ( चचि. २६.१९२ ) मोख्याचा क्षार.

**–निचय**–पु., मुष्कककाण्डसमूहः ( असंसू. ३९.१० ) मोख्याच्या कांडाच्या तुकड्यांची रास.

**–भसन्**–न., मुष्ककरक्षा ( चचि. २६.१९३ ) मोख्याची राख.

**–मुष्ककादिगण**–पु., वर्ग० मुष्ककपलाशधवचित्रक-मदनवृक्षकशिंशपावज्रवृक्षास्त्रिफला च, तद्गुणाः–मेदमेहार्शःपाण्डुरोगघ्नः शर्करानाशनः शुक्रदोषजिच्च ( सुसू. ३८.२०-२१ )
मुष्ककादिवर्गाचा गण. ह्या गणात मोखा, पळस, धावडा, चित्रक, गेळ, कुडा, शिसव, निवडुंग व त्रिफला ही औषधे आहेत. **गुण**—मेद, प्रमेह, मूळव्याध, पांडु, मूत्रशर्करा व शुक्रदोष नाशक.
दुसरा मुष्कक्कादिगण.
**मुष्ककपलाशधवस्नुग्वराद्वीपिशिंशपाः । तद्गुणाः–गुल्ममेहाश्मरीपाण्डुमेदोऽर्शोघ्नः कफशुक्रजिच्च** ( अहसू. १५.३२; असंसू. १६.२६ )
मोखा, पळस, धावडा, निवडुंग, त्रिफळा, चित्रक, शिसवा. हा मुष्ककादिवर्ग. **गुण**—वर आहेत.

**मुष्टि**–पु., **परिमाण० स द्विविधः, सनखमुष्टिरन्तर्नख-मुष्टिश्चेति** ( चक. ९.१४ )
मूठ, पोकळ मूठ आणि घट्ट मूठ असे त्याचे दोन भेद. नखे दिसणारी व न दिसणारी मूठ.
**परिमाण० प्रदेशिन्याः मूलपर्यन्तं कृतं मुष्टिपरि-माणम्** ( चक. ३.५ )
मूठभर प्रमाण अंगठ्याजवळील बोटाच्या मुळापर्यंत वळलेली ( बंद केलेली ) मूठ. हे एक मोजण्याचे प्रमाणच आहे.
**वनस्पति० मुष्ककः** ( ध. ५.१३२ )
मोखा, मोखाडा.
**वनस्पति० विषमुष्टिः** (र. २४.१३४) कुचला.
स्त्री., **घण्टापाटला** ( र. २४.१३४ ) मोखा.
पु., स्त्री., **मान० द्वे पलाध पलम् इति यावत्** ( चक. १२.९२; सुचि. २९.12; र. ११.६ )
चार तोळे.

**मुष्टिक**–पु., **वनस्पति० धान्य० शालिः** ( ध. ६.६९ )
एक प्रकारचे तांदूळ.
**न., मान० मुष्टिः, चतुस्तोलकमानम्** ( र. २८.४८-५२ ) चार तोळे.

**मुसलमूषा**–स्त्री., **मूषा० मूले चिपिटा वर्तुला चाष्टाङ्गुलोन्नता च । इयं स्त्रीरोगोपयुक्तस्य चक्रिबद्धरसस्य निर्माणे उपयुक्ता** ( र. १०.३२ )
मुसेचा एक प्रकार. मुसळाचे स्वरूपाची मूस. मुळात चापट, वाटोळी ८ अंगुळे उंच. हिच्यांत स्त्रीरोगांवर उपयुक्त चक्रिकाबद्ध रस तयार करतात.

**मुसली**-स्त्री., वनस्पति० कन्द० **श्वेतकृष्णभेदेनेयं द्विविधा । तत्र श्वेता स्वल्पगुणोपेता कृष्णा च रसायनी । तद्गुणाः- मधुरा शीता पिच्छिला वृष्या पुष्टिबलप्रदा कफदा पित्तघ्नी पित्तदाहश्रमहरा च** ( रापरि. ७.५८; र. २४.७ )
हिं.—कालीमुषली, नियामुसि, सिया.
**म.—मुसळी.**
गु.—मुसळी.
बं.—तालमूली, तालुर.
ता.—निलप्पनै, तिरक्कतारु.
मुसळी ( कंद ) पांढरी व काळी अशी दोन प्रकारची. पांढरी अल्पगुणी; काळी सर्वधातुपरिपोषणी. **गुण**- गोड, थंड, बुळबुळीत, शुक्रवर्धक, पुष्टि व बल-दायक, पित्त, दाह, थकवा, नाशक, कफवर्धक.

**मुस्त**-न., वनस्पति० **लेखनीयगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.९(३); असंसू. १५.८ ) **तृप्तिघ्नगणोक्तमेकं द्रव्यम्** (चसू. ४.११; असंसू.१५.१६) **स्तन्यशोधनगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१२; असंसू १६.३४) **कण्डूघ्नगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.११ ) **तृष्णानिग्रहणगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१४ ) **साङ्ग्राहिकदीपनीयपाचनीयानां श्रेष्ठम्** ( चसू. २५.४०; असंसू. १३.३ ) **नागरमुस्तभद्रमुस्तभेदेन मुस्तं द्विविधम् । तद्गुणाः-तिक्तकटुककषायं शीतं पाचनं सङ्ग्राहि श्लेष्मपित्तघ्नं रक्तविकृतिज्वराऽतिसारतृष्णाकृमिघ्नं च**
( असंसू. १२.१७; ध १.४० )
हिं.—मोथा.
**म.—मोथा.**
गु.—मोथ, मोथ्य.
बं.—मुथा, मुता.
त.—कोरैक्किळंकु.
फा. मुश्कजमीन्.
नागरमोथा. लेखनीयगणामध्ये सांगितलेले द्रव्य. तृप्तिघ्नगणांतील एक द्रव्य, स्तन्य शोधनगणांतील एक द्रव्य. त्याचप्रमाणे कण्डूघ्न, तृष्णानिग्रहण, सांग्राहिक, दीपनीय, पाचनीय इत्यादी वर्गातील एक श्रेष्ठ द्रव्य. त्याचे प्रकार लहान आणि मोठा असे दोन आहेत. नागरमोथा आणि भद्रमोथा अशी दोन नावे आहेत. त्याचे गुण- तिक्त, कटुक, कषाय, शीत, पाचन, संग्राहि, कफपित्तशामक, रक्ताचे विकार, ज्वर, अतिसार, तहान, कृमि, यांचा नाश करणारा आहे.

**मुस्ता** )-स्त्री., वनस्पति० **मुस्तम्** ( र. २.२४ ) असंसू. १६.४० ) नागरमोथा.

**-शुण्ठ्यम्बु**-न., **मुस्ताशुण्ठीभ्यां क्वथितं जलम्** असंसू. ४.२७) नागरमोथा आणि सुंठ यांचा काढा.

**मुस्तक**-न., वनस्पति० **मुस्तम्** ( असंसू. १६.१८ ) नागरमोथा.
**स्थावर० कन्दविष० एतत् स्निग्धं घनं गुरु कर्मण्यं च** ( असंउ. ४८; र. २९.१८ ) **अनेन गात्रस्तम्भो वेपथुश्च जायते** ( सुक. २.५,१५ )
कन्दविष. हे स्निग्ध घट्ट व जड. याने अवयव जखडणे व कंप हे उपद्रव होतात.

**मुस्तादिकगण**-पु., वर्ग० **मुस्ताहरिद्रादारुहरिद्राहरीतक्यामलकबिभीतककुष्ठहैमवतीवचापाठाकटुरोहिणीशार्ङ्गेष्टातिविषाद्राविडीभल्लातकानि चित्रकश्च । गणोऽयं कफनाशनो योनिदोषहरः स्तन्यशोधनः पाचनश्च** ( सुसू. ३८.५४-५५; असंसू. १६.३४; अहसू. १५.४० )
मुस्तादिगणाचा वर्ग. नागरमोथा, हळद, दारुहळद, हिरडा, आवळा, बेहडा, कोष्ठ, पिवळा धोत्रा, वेखंड, पहाडमूळ, कुटकी, सागरगोटा, अतिविष, वेलदोडा, बिबा, चित्रक. **गुण**—हा मुस्तादिगण कफनाशक, दुधाची शुद्धि करणारा, आणि पाचक आहे.

**मुस्ताद्यगण**-पु., वर्ग० **मुस्तपर्पटाद्यष्टादशद्रव्यसङ्ग्रहः । अयं पित्तोत्तरसन्निपाते हितः** ( काविशेषकल्प )
मुस्तादिवर्गाचा गण. नागरमोथा, पित्तपापडा इत्यादी अठरा द्रव्ये पित्ताधिकसंनिपातात हितकर.

**मुहुर्**- ( अव्य ) पुनः ( असंसू. २३.२० )
पुनः पुनः; परत परत.

**-मुहुर्**-( अव्य. ) पुनः पुनः **भैषज्यकाल० यदौषधं सभक्तमभक्तं वा सभुक्तमभुक्तं वा वारंवारमुपयुज्यते तत् श्वासकासहिक्कातृट्छर्दिषु विषनिमित्तेषु विकारेषु च मुहुर्मुहुर्भैषजं देयम्** ( चचि. ३०.३००; सुउ. ६४.७८; काखिल. ३.४८ )
औषध देण्याचे कालातील एककाल. जे औषध जेवणाबरोबर वा एरवी, जेवणानंतर वा अनशेपोटी वारंवार उपयोगात आणले जाते ते. खोकला, उचकी, तहान, ओकारी, विषज विकारावर पुनः पुन्हा औषध द्यावे.

**मुहूर्त**-पु., न., कालभाग० इयं ज्योतिःशास्त्रीया संज्ञा (चसू. १५.९) विंशतिकलो मुहूर्तः (सुचि. २९.१०) दिनस्य रात्रेश्च पञ्चदशो भागः (सुसू. ४५.७) घटिकाद्वयम् (सुचि. ३३.७) नाडिकाद्वयम् (असंसू. ४.५)
घटका म्हणजे मुहूर्त. ही ज्योतिःशास्त्रातील संज्ञा. २७ कला म्हणजे मुहूर्त. दिवस व रात्रीचा पंधरावा भाग.

**मूक**-वि., शब्दोच्चारणाक्षमः । वातप्रकोपेण गर्भात् प्रभृति मूको भवति (सुशा. २.५१) सकफो वायुः शब्दवाहिनीः धमनीरावृत्य नरान् मूकमिन्मिणगद्गदान् करोति (सुनि. १.८५)
मुका. शब्दोच्चार करण्यास असमर्थ. वातप्रकोपाने अगदी गर्भावस्थेतच मुकेपणा येतो. कफासह वायु शब्दवाहिनी धमनीवर आवरण करून माणसाला मुका किंवा गेंगाणा उच्चार करणारा करतो.

**-ता**-स्त्री., अवाक्त्वम्, उच्चैः संभाषणाद्वायुः शिरसि रुजमान्ध्यं, जाड्यम्, अजिघ्रत्वं, बाधिर्यं तथा मूकतामापादयेत् (सुचि. ३९.३०)
ग्रीवायां मर्माणि चतस्रो धमन्यः (द्वे नीले द्वे मन्ये च) तत्र विद्धस्य मूकताऽरसग्राहिता स्वरवैकृतं चेति लक्षणानि भवन्ति (सुशा. ६.२७)
मुकेपणा. मोठ्याने बोलण्याने वायु डोक्यात वेदना, आंधळेपणा, जडपणा, वास न येणे, ऐकू न येणे, तसेच बोलता न येणे या विकृति करतो. मानेत मर्मे चार. धमन्या-दोन नीला, दोन मन्या. त्याना आघात झाला तर रसग्रहणाचा अभाव व स्वराची विकृति होते.

**-त्व**-न., रोग० मूकता शब्दोच्चारणेऽसामर्थ्यम् (चसू. ५.३८) अशीतिवातविकारेष्वेकः (चसू. २०.११)
मुकेपणा. शब्द उच्चारण्याचे असामर्थ्य. ऐंशी वात विकारांपैकी एक.

**-मूषा**-स्त्री., अन्धमूषा । सपिधाना वज्रादिमूषा (र. २.७१) मूषेचे नाव. झांकण युक्त मूस.

**मूच**-पु., मत्स्यजातीयः प्राणि० (काखिल० २४.४९-५१) माशाचे जातीतील प्राणी.

**मूढ**-वि., अज्ञः (सुनि. ४.९) व्यामोहयुक्तमनाः (सुसू. ३३.१७)
वेडा. कांही ज्ञान न होणारे मन. मोहयुक्त मन- (मोहित मन) असलेला.

**-गर्भ**-पु., गर्भरोग०, अष्टमहागदेष्वेकः (सुसू. ३३.१३) मूढश्चासौ गर्भश्चेति मूढगर्भः। निरुद्धगतिः व्यासक्तगतिः गर्भः (ड) सुनि .८.१) गर्भस्य पतनावस्थायां अकालप्रसवावस्थायां कालप्रसवावस्थाय वा अयं व्याधिर्भवति। तस्मात् चतुर्थमासादनंतरं घनावयवत्वात् मूढगर्भो भवति ((ड.) सुनि. ८.१०) व्याख्या-सर्वावयवसंपूर्ण-मनोबुद्ध्यादिसंयुतः । विगुणापानसंमूढो मूढगर्भोऽभिधीयते॥ तमेव कदाचिद्विवृद्धमसम्यगागतमपत्यपथमनुप्राप्तमनिरस्यमानं मूढगर्भ इति आचक्षते (सुनि. ८.१-३) हेतुसंप्राप्तिः-वायुः यदा मूढो विमार्गगामी निरुद्धगतिः भवति तदा निरुद्धगतित्वेन स्वकार्यानर्हो भवति (सुनि. ८.३)

गति० विगुणानिलप्रपीडनवैचित्र्यादसंख्यगतयो भवन्ति (असंशा. ४.२९) समासतस्त्रिविधा गतिः-ऊर्ध्वा, तिर्यक्, न्युब्जाच (असंशा ४.३०) संस्थानानि, नामानि लक्षणानि च। संस्थानानि पुनरष्टौ (असंशा. ४; सुनि. ८.५) पूर्वरूपम्-योनितो रक्तस्रवणं शूलं च भवति (मानि.)
सामान्यलक्षणम्-अधोवातस्य रोधनेन मलमूत्रवातगर्भाणां संगो भवति (अहसू. ४.२) योनिजठरकट्यूरुप्रदेशेषु शूलो मूत्रसङ्गश्च (मा.) प्रधानलक्षणम्-अपत्यपथमनुप्राप्तस्य गर्भस्य अनिरस्यमानत्वं प्रधानं लक्षणम् (सुनि.८.३) विशेषलक्षणम्-अनुमता सुश्रुतस्याष्टविधा मूढगर्भगतिः-द्वाभ्यां सक्थिभ्यां योनिमुखमागतः प्रथमो मूढगर्भः। स्फिग्देशेन योनिमुखं प्रतिपद्यते आभुग्नसक्थिशरीरश्च तृतीयो मूढगर्भः। परिघस्येव तिर्यगागतः-कश्चिदुरःपार्श्वपृष्ठानामन्यतमेन योनिद्वारं पिधायावतिष्ठते, स चतुर्थो मूढगर्भः। एकेन बाहुना योनिमुखं प्रतिपद्यते पार्श्वमध्यनिक्षिप्तशिराः स पार्श्वापवृत्तशिराः, पञ्चमो मूढगर्भः। आभुग्नशिराः बाहुद्वयेन योनिमुखं प्रतिपद्यते, स षष्ठः। यदा आभुग्नसंकुचितमध्यो हस्तपादशिरोभिः योनिमुखं प्रतिपद्यते। स सप्तमो मूढगर्भोऽशक्याहरणश्च। अष्टाङ्गहृदये एको विष्कम्भप्रकारः। एकेन सक्थ्ना योनिमुखं प्रतिपद्यते अपरेण सक्थ्ना गुदं प्रतिपद्यते सोऽष्टमः। स आहरणाऽशक्योऽष्टाङ्गहृदये द्वितीयो विष्कंभप्रकारः (सुनि. ८) अन्ये मूढगर्भप्रकाराः तल्लक्षणानि च। कीलमूढगर्भलक्षणम्-सम्यक् कील-

वत् संकीलकः । तेनोर्ध्वबाहुचरणशिरोभिः कीलकवल्लग्नो योन्यां संकीलकः ( मा., ) प्रतिखुरः–प्रतिखुरः ' कायसङ्गी ' इत्यपरपर्यायः । खुरैः हस्तपादैः योनिमुखं प्रतिपद्यते ( मा., ) बीजकः–भुजद्वयोपहितं शिरो यस्य, स तथाभूतः सन् यो योनिं गच्छेत् स बीजकः ( मानि., ) अन्यः प्रकारः– यस्य एको भुजः शिरसासह निर्गच्छति, स बीजकः ( ड. सुनि. ८.४ ) परिघः–यः परिघेण तुल्यः योनौ स्थितः, स परिघः ( मानि., ) विपुलशिरोमूढगर्भः–शिरसा विपुलेन योनिमुखं पिधाय लग्नो भवति ( मा ) जठरेणागतमूढगर्भः यः उदरेण योनिद्वारं पिधाय सक्तो भवति ( मा. ) कुब्जमूढगर्भः–स द्विविधः अन्तःकुब्जो बहिःकुब्जश्च (मा.) एकभुजागतमूढगर्भः, भुजद्वयागतः, तिर्यगागतः, अवाङ्मुखः, ग्रीवाभङ्गादधःसंलग्नः, पार्श्वनतमूढगर्भश्चेति ( मा. ) मूढगर्भोपद्रवाः–योनिसंवरणं, संगः, कुक्षौ मक्कलश्च ( मा. ) गर्भकोषपरासंगः मक्कलो योनिसंवृतिः इति ( सुसू. ३३.१२ ) असाध्यलक्षणानि–विपरीतेन्द्रियार्थाक्षेपकयोनिभ्रंशसंवरणमक्कलश्वासकासभ्रमादीनि ( सुनि. ८.६ ) या मूढगर्भा अपविद्धशिरा शीताङ्गी, निरपत्रपा, नीलोत्संगसिरा च भवति तस्याः मूढगर्भोऽप्यसाध्यः ( मा. ) तत्र शीतगात्रां प्रत्युद्गारां च वर्जयेत् (असंशा. ४.३१) मूढगर्भचिकित्सा–सा चतुर्विधा, औषधचिकित्सा-जरायुपातनसामान्यकर्म, अथर्ववेदविहितमन्त्रादिकर्म, शल्याहरणकर्म, शस्त्रकर्म च । जीवति तु गर्भे सूतिकागर्भनिर्हरणे प्रयतेत ( सुचि. १५.५ ) तत्रापरापातनोदितानि औषधानि विदध्यात् । च्यावनान्मंत्रानुपश्रृणुयात्

( सुचि. १५.५-९ )

तत्र निष्फले मन्त्रे तन्त्रे च दृष्टकर्मणा शल्यहर्त्रा भिषजा शल्याहरणोपायाः कर्तव्याः । मूढगर्भशल्योद्धरणं कष्टतममस्ति ( सुचि. १५.३ ) अत्र हि योनियकृत्प्लीहान्त्रविवरगर्भाशयानां मध्ये कर्म कर्तव्यं स्पर्शेन, उत्कर्षण–( अधोगतस्योर्ध्वीकरणम् ) अपकर्षण–( ऊर्ध्वगतस्याधःकर्षणम् ), स्थानापवर्तन ( व्यावर्तन–गर्भशय्यायां तिर्यगादिस्थितस्योत्तानस्याधोव्यावृत्त्यास्थापनम् ) प्रतिलोममनुलोमयेत् ( सुशा. १०.१० ) पीडन ( चम्पनम् ), ऋजूकरणं ( वक्रस्य प्राञ्जलीकरणम् ), चैकहस्तेन गर्भं गर्भिणीं चाहिंसता परं च यत्नमास्थायोपक्रमेत (सुचि. १५.३) संगे सूत्यः प्रयतेरन् पूर्वोक्तानि च मन्त्रौषधानि प्रयुञ्जीत ( असंशा. ४.३३ ) सुश्रुतस्याद्यं मूढगर्भत्रितयं पादाभ्यामाहरणीयम् । तदितरत्तु त्रितयं शिरसा, द्वौ अन्त्यौ मूढगर्भौ आहरणाऽशक्यौ तस्मात्तयोः शस्त्रमवचारयेत् ( सुचि. १५.९; असंचि. ४.३९-४२ ) गर्भिणीरक्षार्थं यन्त्रशस्त्राद्युपायेन गर्भपातनं कार्यम् । अभुक्तवत्यां शस्त्रकर्म कुर्वीत ( सुसू. ५.१६; अहसू. २९.१६ ) शस्त्रकर्म–उत्कर्तनभेदनच्छेदनदारणानि । ततः स्त्रियमाश्वास्य मण्डलाग्रेणाङ्गुलीशस्त्रेण वा शिरो विदार्य, शिरःकपालान्याहृत्य, शङ्कुना गृहीत्वोरसि कक्षायां वाऽपहरेत्; अभिन्ने शिरसि चाक्षिकूटे गण्डे वा । अंससंसक्तस्यांसदेशे बाहू छित्वा, दृतिमिवाततं वातपूर्णोदरं वा विदार्य, निरस्यान्त्राणि शिथिलीभूतमाहरेत् । जघनसक्तस्य वा जघनकपालानीति । यद्यत् गर्भस्याङ्गं तत्र सज्जति, तस्य तदङ्गं छित्त्वा सम्यङ्निर्हरेत्, नारीं च यत्नतो रक्षेत् । अनिलकोपतो गर्भस्य चित्राः गतयो जायन्ते । तत्रानल्पबुद्धिः वैद्यो विधिपूर्वकं वर्तेत । मुहूर्तमपि मृतं गर्भं नोपेक्षेत । अपतन्तीमपरां पातयेत् । पार्श्वाभ्यां परिपीड्य अथवा हस्तेनापहरेत् । एवं निर्हृतशल्यामुष्णेन वारिणा सिञ्चेत् योनौ स्नेहं च निधापयेत् ( सुचि. १५.१२-१९ ) मातुः मृतायाः अपि जीवतो गर्भस्यापकर्षणमुदरपाटनपूर्वकमवश्यं कर्तव्यम् । बस्तमारविपन्नायाः गर्भिण्याः कुक्षिः यदि प्रस्पन्देत ( जीवतो गर्भस्य लक्षणम् ) तर्हि भिषक्तत्क्षणात् तं शिशुं गर्भिण्या उदरं पाटयित्वोद्धरेत् । ( सुनि. ८.१४ ) रिष्टलक्षणयुक्तायाः मूढगर्भायाः अपि गर्भं शस्त्रेण निर्हरेत

( काखिल. १०.१७२ )

मूढगर्भ. म्हणजे अडलेला गर्भ. ८ महारोगांपैकी एक. शरिराचा मनाचा व ज्ञानेंद्रियाचा पूर्ण विकास झालेला पुऱ्या दिवसाचा गर्भ प्रसववेदना सुरू होऊन, अपत्यपथात येऊन अपान वायु प्रकुपित झाल्यामुळे तो बाहेर न येता तेथेच अडकून बसतो. त्यास मूढगर्भ म्हणतात. व्यवहारात यालाच बाळंतीण अडली आहे असे म्हणतात. वायूच्या गतीला अनुसरून हे गर्भ अडण्याचे असंख्य प्रकार संभवतात. त्यात मुख्य ( १ ) ऊर्ध्व ( २ )

तिर्यक् आणि पालथी अशा तीन अवस्था होत. सुश्रुताच्या मते मूढगर्भ ८ प्रकारचे आहेत. ते असे— (१) दोन्ही मांड्यांनी योनिमुखात आलेला (२) ढुंगण योनिमुखात अडकणे (३) शरीर आणि—मांड्या वाकून योनिमार्गात अडकणे (४) वर्तुलाकार तिरकस झाल्याने छाती, बरगड्या, पाठ यापैकी कोणता तरी भाग योनिमुखाशी येऊन अडतो. (५) एक हात बाहेर आणि डोके छातीकडे वळून योनिमुखाशी येऊन अडतो. (६) दोन्ही हात बाहेर आणि डोके मागे वाकलेल्या स्थितीत योनिमुखाशी अडतो. (७) हातपाय आणि डोके वाकून शरिराचा मध्यभागच संकुचित होऊन योनि-मुखाशी येतो. अशा स्थितीत त्याला बाहेर काढणें अशक्य असते. (८) एक मांडी योनिप्रदेशाकडे आणि एक मांडी गुदाकडे अशा स्थितीत अडतो. हा सुद्धा बाहेर काढणे अशक्य असते. शेवटच्या दोन प्रकारांना अष्टांगहृदयात पहिला विष्कंभक आणि दुसरा विष्कंभक अशी नावे आहेत. **आणखी काही मूढगर्भप्रकार**—व त्यांची लक्षणे **कीलमूढगर्भ**—**१ कीलक**—हात पाय आणि डोके यांच्याद्वारे योनिमार्गात खिळ्याखारखा येतो (२) **प्रतिखुर**—किंवा **कायसंगी**—या प्रकारात हातपाय योनिमुखात येतात. (३) **बीजक**—दोन्ही हात डोक्यावर ठेवलेल्या स्थितीत योनिमुखाशी येतो. या प्रकारातच एक हातच डोक्यावर असलेला अशीही स्थिति असते (४) **परिघ**—वर्तुळाकार होऊन योनिमुखाशी अडतो. यात पुन्हा २ प्रकार संभवतात; त्यापैकी एका प्रकारात डोके मोठे असून ते योनिमार्गात अडणे व दुसरा प्रकार पोटाचाच भाग पुढे योनिमार्ग अडवतो. (५) **कुब्ज**—ह्याचे २ प्रकार. अंतःकुब्ज म्हणजे आत वाकलेला. व दुसरा बहिःकुब्ज म्हणजे पाठीकडे वाकलेला. या शिवाय एक हात, दोन हात बाहेर येणे. तिरके बाहेर येणे. खाली तोंड करून बाहेर येणे. मान मोडल्यामुळे खाली येऊन अडणे व एका बाजूला वाकून योनिमार्गात अडणे. **उपद्रव**—योनिमार्ग संकुचित होणे, मलमूत्रादिकांनी तुंबणे, व कुशीमधे मक्कल शूल होणे, वार बाहेर येऊन अडणे, मक्कलयुक्त योनि आवळल्यासारखी होणे. **असाध्य लक्षणे**—स्त्रीला नाक, कान, डोळे इ० अवयवांच्या विषयाविषयी विपरीत भास होणे. झटके येणे, योनि बाहेर येणे, योनि संकुचित होणे, मक्कल शूल, श्वास, खोकला, भ्रम इत्यादी. तसेच ज्या स्त्रीचे डोके सावरता येत नाही, शरीर थंड झाले आहे, लज्जा नाहीशी झाली आहे, आंगावर निळ्या शिरा उमटून वर आल्या आहेत. वेणा बंद पडल्या आहेअ अशा स्त्रीची जगण्याची आशा नसते.

**चिकित्सा**—प्रकार ४. औषधी चिकित्सा, वार बाहेर येईल अशी योजना, गर्भ बाहेर येण्याची योजना व जरूर तर त्यासाठी शस्त्रकर्म करणे व अथर्ववेदोक्त मंत्रादींचा प्रयोग. गर्भ जिवंत असेल अशा स्थितीत त्याला बाहेर काढावे. त्यावेळी वार बाहेर येण्यासाठी योग्य अशी औषधे द्यावी. अशक्य असेल तेव्हां मंत्रप्रयोग करावे. मंत्र निष्फळ झाल्यास शस्त्रकर्म करावे. योनी, यकृत, प्लीहा, आंत्र यांची पोकळी व गर्भाशय यामध्ये स्पर्श करून गर्भाची स्थिति लक्षात घ्यावी. जर तो खाली गेला असेल तर वर करावा, वर गेला असेल तर खाली आणावा, वेडावाकडा असेल तर फिरवून सरळ करावा, दाबून धरावे, गर्भ आणि गर्भिणी या दोघांनाही अपाय होणार नाही अशा दृष्टीने ह्या क्रिया कराव्या. सुश्रुताने सांगितलेल्या प्रकारांपैकी पहिल्या तीनही प्रकारात गर्भाला पायाकडूनच बाहेर आणण्याचा यत्न करावा. पुढच्या तीन प्रकारात डोक्याकडून बाहेर आणण्याचा यत्न करावा. व शेवटच्या दोन प्रकारात बाहेर आणणे अशक्य असते म्हणून शस्त्रकर्म करावे. गर्भिणीचे रक्षण व्हावे या दृष्टीने यंत्रशस्त्रादीच्या सहाय्याने गर्भ बाहेर काढावा. अशा वेळी करावयाचे शस्त्रकर्म रिकाम्या पोटी करावे. **शस्त्रकर्म** उत्कर्तन (कापणे) भेदन (फोडणे) छेदन (तुकडे करणे) आणि दारण (फाडणे) या पैकी योग्य ती शस्त्रक्रिया करावी. शस्त्रकर्म करताना स्त्रीला धीर देऊन मंडलाग्र किंवा अंगुलि शस्त्राने गर्भाचे डोके फोडून डोक्याच्या कवटीचे तुकडे काढून शंकुयंत्राने छाती किंवा काख या ठिकाणी पकडून गर्भ ओढून काढावा किंवा डोळ्याच्या खोबणीत अथवा गालाच्या पोकळीत शंकु यंत्राने ओढून काढावे. खांदे फसून गर्भ अडला असेल तर खांद्यापाशीच दोन्ही बाहू तोडून गर्भाला बाहेर काढावे. गर्भाचे पोट पाणी साठून किंवा वायुसंचयाने भरलेले असेल

तर ते फाडून आतडी काढून गर्भ सैल व बारीक झाल्यावर पूर्वीप्रमाणेच शंकुयंत्राने ओढून काढावे. कमरेचा भाग ढुंगणासह फसला असेल तर कमरेतील चपटी हाडे फोडून गर्भास बाहेर काढावे. सारांश गर्भाचे जेजे अंग फसल्यामुळे गर्भ अडतो तेते कापून योग्य प्रकारे गर्भ बाहेर काढावा व प्रयत्नाने गर्भिणीचे प्राण रक्षण करावे.

गर्भ मेला आहे असे कळल्यानंतर क्षणाचाही विलंब न करता प्रयत्नाने सुटका करावी. वार पडत नसेल तर ती पाडण्याचा यत्न करावा. त्यासाठी सभोवार दाब देऊन किंवा हात घालून ती काढावी. या प्रमाणे गर्भिणीची पूर्ण सुटका झाल्यावर आत काही शल्य राहिले नाही असे पाहून ऊन पाण्याने तिला शिंपावे आणि योनीमध्ये स्नेह ठेवावा.

आई मेल्यानंतरही गर्भ जिवंत आहे असे आढळले तर पोट फाडून गर्भ काढून घेणे हे आवश्यक आहे. श्वासावरोध होऊन मृत्यु आलेल्या गर्भिणीच्या कुशीत जर स्पंदन दिसत असेल तर गर्भ जिवंत आहे असे समजून ताबडतोब तिचे पोट फाडून गर्भ बाहेर काढावा. रिष्ट लक्षण युक्त मूढ गर्भा स्त्रीचेही पोट फाडून गर्भ काढावा.

**–(गर्भा)**–स्त्री., **मूढो गर्भो यस्याः सा। मूढगर्भायाः रिष्टलक्षणानि–यस्याः मुखं पूतिगन्धि शूलं चैवोपजायते निद्रा वा अभिद्रवति सा मूढगर्भा न जीवति** ( काखिल. १०.१६८ ) **पार्श्वशूलं, तृष्णा, संज्ञानाशः, श्वासो वर्त्मरोधः शूनपादमुखता, कटिग्रहः, प्रलापः, इत्येतानि यस्याः लक्षणानि, सा मूढगर्भा नो जीवति** ( काखिल. १०.१७० )

जिचा गर्भ अडला आहे ती गर्भिणी. मरणदर्शक चिन्हे– जिच्या तोंडाला कुजट घाण येते, ओटी पोटात शूल होतो किंवा झोप नाहीशी होते, ती जगत नाही. तसेच फासळ्यात शूल, तहान, बेशुद्धि, श्वास, पापण्या मिटत नाहीत, पाय व तोंड यांवर सूज, कमर जखडते, बडबड अशी लक्षणे जिला होतात ती अडलेली गर्भिणी जगत नाही.

**–गर्भचिकित्सित**–न., **अध्यायसंज्ञा०** ( सुचि. १५.१ )

या नावाचा अध्याय. यात अडलेल्या गर्भावरील उपचार आहेत.

**–गर्भनिदान**–न., **अध्यायसंज्ञा०** ( सुनि. ८. १ )

या नांवाचा अध्याय. यांत अडलेल्या गर्भाची माहिती आहे.

**–गर्भशल्य**–न., **मूढगर्भ एव गर्भिण्याः शल्यं भवति। तस्योध्दरणं कष्टतमं विद्यते** (सुचि. १५.३)

मूढगर्भ हेच गर्भिणीला शल्य होते. ते काढणे अतिकष्टाचे असते.

**–परिषद्**–स्त्री., **ज्ञानहीनानां समूहः परिषद् वा। परिषत्तु खलु द्विविधा–ज्ञानवती मूढपरिषच्च** ( चवि. ८.२० )

मूर्खांचा समूह किंवा सभा; ती दोन प्रकारची. ज्ञान्यांची व मूर्खांची.

**–मारुत**–पु., मूढवातः ( असंसू. २४.६१ )

मूढवात. रोधला गेलेला वात.

**–वात**–पु., **रोग० मार्गावरुद्धः, गतिरहितः, रुद्धगतिर्वा वातः। अपानवायौ अवरुद्धे सति विशेषतः आध्मानं शूलो मलावरोधश्च जायते, तत्र चिकित्सा-वातस्यानुलोमनम्** ( चचि.१६, चचि. ८.१४७; चचि. ११.२७; चसू. २३.२२; र. २१.१२२; काखिल. १८.५७ )

मार्गात अवरोध झालेला वायु, गति अडलेला वात. अपान वायु रुद्ध झाला असता पोटफुगी, शूल, मलावरोध होतो. उपचार–वात सरणारी औषधे देणे.

**–वातानुलोमन**–वि., **अननुलोमगो वातोऽनुलोमताम् आपाद्यतेऽनेनेति मूढवातानुलोमनम्; अम्लो रसो मूढवातानुलोमनः** ( अहृसू. १०.११ )

मूढ वाताला अनुलोम करणारे. आंबट रस रुद्धवात सरविणारा आहे.

**–संज्ञ**–वि., **नष्टबुद्धिः। मानसोन्मादलक्षणानामेकम्** ( सुउ. ६२.१३ )

मानसिक उन्मादाच्या लक्षणापैकी एक लक्षण.

**–संज्ञता**–स्त्री., **लक्षण० नष्टसम्यग्ज्ञानता वातक्षयलक्षणानामेकम्** ( सुसू. १५.७ )

योग्य ज्ञान न होणे वातक्षय लक्षणांपैकी एक लक्षण.

**मूढात्मन्**–पु., **विस्मृतशीलः** (सुसू. ३१.११) विसराळू.

**मूत्र**–न., **मल०** (चसू. १.६९) **अन्नमल०**, (चसू.१४.४; चशा. ७.१५) **मूत्रशकृती अन्नमलौ** (अहृसू.१.१३;) **मूत्रशकृत्स्वेदाः इति त्रयो मलाः** ( असंसू. १.३१ ) **अन्नक्लेदनिर्वाहणेन मूत्रम्** ( असंसू. १९.५ ) **शरीरे मूत्रस्य प्राकृतं प्रमाणं चत्वारोऽञ्जलयः** (चशा.७.१५)

मानुषं मूत्रं विषापहम् ( असंसू. ६.१४८ ) कार्यम्–बस्तिपूरणविक्लेदकृन्मूत्रम् (सुसू.१५.५(२) मूत्रक्षये लक्षणं–बस्तितोदोऽल्पमूत्रता च (सुसू. १५.११) मूत्रस्य वृद्धिलक्षणं–प्रचुरमूत्रगमनं मुहुः मुहुः प्रवृत्तिं बस्तितोद आध्मानं च ( सुसू. १५.१५ ) मूत्रवेगविधारणादङ्गभङ्गाऽश्मरीबस्तिमेढ्रवङ्क्षणवेदनाः तथाऽधोवातरोधजविकाराः शकृद्रोधजा विकारा अपि जायन्ते ( अहृसू. ४.४-५ ) मूत्रस्य निर्माणं–पक्वाशयगता या मूत्रवहा नाड्यः ताः सरितः सागरमिव सदा मूत्रं तर्पयन्ति । आसां सहस्रशो मुखानि सूक्ष्मत्वान्नोपलभ्यन्ते । मूत्रस्याशयोऽस्य निःस्यन्देन जाग्रतः स्वपतश्चैव वा पूर्यते यथाऽऽमुखात्सलिले न्यस्तो नवो घटः पार्श्वेभ्यः पूर्यते तद्वत्

( सुनि. ३.२०-२३ ) प्राणिनां मूत्राणि चिकित्सायामुपयुज्यन्ते । अष्टौ मुख्यानि मूत्राणि, तद्यथा–गोमूत्रंमाहिषमूत्रमविमूत्रमजामूत्रमश्वमूत्रं, गजमूत्रं, खरमूत्रमुष्ट्रमूत्रं च ( सुसू. ४५.२१७-२१९ ) मूत्रस्य सामान्यगुणाः–कृमिशोफोदरानाहशूलपाण्डुकफानिलगुल्मारुचिविषश्वित्रकुष्ठार्शांसि च मूत्रं जयेत् ( अहृसू. ५.८२-८३)

तत्र विशेषगुणाः–अश्वमूत्रं योनिरोगेषु पिच्वादिधारणे उपयुज्यते । अपस्माररोगे कपिलानां गवां तथा श्वशृगालबिडालानां सिंहादीनां च मूत्रं नावनार्थं उपयुक्तं भवति ( चचि. १०.४१ ) नष्टार्तवोपचारेषु गोमूत्रमुपयुज्यते ( सुशा. २.२२ ) अथ मूत्राणि–गोमहिषाजाविगजहयखरोष्ट्राणां तीक्ष्णान्युष्णानि, कटूनि, तिक्तानि, लवणानुरसानि, लघूनि, शोधनानि, कफवातकृमिमेदोविषगुल्मार्श-उदर–कुष्ठशोफारोचक पाण्डुरोगहराणि हृद्यानि दीपनानि च सामान्यतः ।

तत्र गोमूत्रं कटु, तीक्ष्णोष्णं, सक्षारत्वादवातलं लघ्वग्निदीपनं, मेध्यं, पित्तलं, कफवातजित्, शूलगुल्मादरानाहविरेचकास्थापनादिषु मूत्रप्रयोगसाध्येषु प्रयोजयेत् । माहिषं मूत्रं दुर्नामोदरशूलेषु पाण्डुरोगे चोपयोजयेत् ।

छागमूत्रं– कासश्वासापहं, शोफकामलापाण्डुरोगनुत्, कटुतिक्तान्वितमीषन्मारुतकोपनं च । मेषमूत्रं–सक्षारं, तिक्तकटुकमुष्णं, वातघ्नं, कासप्लीहोदरश्वासशोषवर्चोग्रहेषु च हितम् । अश्वमूत्रं–दीपनं कटु तीक्ष्णोष्णं, कफहरं, वातचेतोविकारनुत्, कृमिदद्रुषु च शस्यते । गजमूत्रं–सतिक्तं, लवणं, भेदि, वातघ्नं, पित्तकोपनं, तीक्ष्णं, क्षारार्थं, किलासरोगे च प्रयोजयेत् । गर्दभमूत्रं–गरचेतोविकारघ्नं, तीक्ष्णं, ग्रहणीरोगनुत्, दीपनं, कृमिवातकफापहं च । औष्ट्रं मूत्रम्–अर्शोघ्नं, शोफकुष्ठोदरोन्मादमारुतकृमिनाशनं च (सुसू. ४५.२१७-२२७) सामान्येन गोमूत्रं तु गोरेव न तु वृषभस्य । आचार्याणां मते गोमहिष्यजावीनां स्त्रीणां, गजहयखरोष्ट्राणां पुनः पुंसां, अनुक्तव्यक्तिके तु मूत्रपाठे उभयोरपि मूत्राणि ग्राह्याणि

( ड. सुसू. ४५.२२१ )

मूत्र– शरिरातील मूत्र, पुरीष हे अन्नाचे २ मल. मूत्र, पुरीष आणि घाम असे एकूण ३ मल आहेत. अन्नक्लेदातूनच पुढे मूत्र होते. मूत्राचे प्रमाण चार अंजली आहे. मूत्राचे कार्य–बस्तीत भरून क्लेदवहन करणे हे होय. मानव मूत्र विष नाशक आहे.

**मूत्रक्षय** झाला असता दिसणारी चिन्हे– मूत्राशयामध्ये दुखावा आणि मूत्राचे प्रमाण कमी होते. **मूत्र वाढले** असता बऱ्याच वेळा लघ्वी व पुष्कळ प्रमाणात वारंवार होते. मूत्राशयाला टोचणी लागते व तो फुगतो.

**मूत्राचा वेग अडविला असताना**— अंग दुखणे, मूतखडा होणे. आड संधि–मूत्राशय– शिश्न यामध्ये ठणका तसेच अपानवायूच्या अवरोधापासून होणारे विकार होतात. मलाचा वेग अडविल्याचे विकारही होतात.

**मूत्राची उत्पत्ति**— पक्वाशयामधील मूत्रवाही नाड्या समुद्राला ज्याप्रमाणे नद्या पाण्याचा सारखा पुरवठा करतात त्याप्रमाणे मूत्राशयरूपी समुद्राला मूत्र आणून सोडतात. ह्या नाड्यांची तोंडे सूक्ष्म असल्यामुळे दिसत नाहीत. मूत्राशयांत रात्रंदिवस सारखे मूत्र येतच असते. नवा घडा पाण्यात ठेवला असता जसा सर्व बाजूंनी त्यात पाण्याचा शिरकाव होतो तशी ही क्रिया होते. निरनिराळ्या प्राण्यांची आठ प्रकारची मूत्रे चिकित्साकार्यासाठी वापरली जातात. ( १ ) गाईचे मूत्र ( २ ) म्हशीचे मूत्र ( ३ ) शेळीचे मूत्र ( ४ ) मेंढीचे मूत्र ( ५ ) घोड्याचे मूत्र ( ६ ) हत्तीचे मूत्र ( ७ ) गाढवाचे मूत्र आणि ( ८ ) उंटाचे मूत्र.

सर्व मूत्रांचे सामान्य गुण–तीक्ष्ण, उष्ण, तिखट, कडू, लवण अनुरस, लघु, शोधन, कफवात. कृमि, भेद, विषगुल्म, मूळव्याध, उदर, कुष्ठ, सूज, अरोचक, पांडुरोग नाशक आहेत. हृद्य व अग्निदीपक आहेत. यापैकी विशेषेकरून घोड्याचे मूत्र योनिरोगात पिचु म्हणजे बोळा वगैरे करण्यासाठी उपयोगी असते. अपस्मारक रोगात कपिल वर्णाच्या गायीचे तसेच कुत्रा, कोल्हा, मांजर, सिंह, वगैरे प्राण्यांचे नस्य म्हणून उपयोगी होते. नष्टार्तव विकारात गाईचे मूत्र उपयुक्त असते.

**गोमूत्राचे गुण**–तिखट, तीक्ष्ण, उष्ण, क्षारामुळे वातवर्धक होत नाही, लघु, अग्निदीपन, बुद्धिवर्धक, पित्तशामक, कफवातशामक, शूल-गुल्म-उदर-बद्ध-कोष्ठ नाहीसे करणारे विरेचन आणि आस्थापन. बस्तीच्या कार्यामध्ये उपयोगी आहे.

**म्हशीचे मूत्र**–मूळव्याध, उदर, शूल, पांडुरोग या विकारांवर उपयोगी. **शेळीचे मूत्र**–खोकला, श्वास, नाहीसे करते; सूज, कावीळ, पांडुरोग नाशक आहे. तिखट व कडू रसाचे असून किंचित वात-प्रकोपक आहे.

**मेंढ्याचे मूत्र**–खारट, कडु, तिखट, उष्ण, वात-शामक, खोकला-पांथरी-उदर-श्वास-शोष मलावरोध, विकारात हितकारक आहे. **घोड्याचे मूत्र**–दीपन तिखट, तीक्ष्ण, उष्ण, कफहर, वायूचे आणि मनाचे विकार नाहीसे करणारे आहे. कृमि व गजकर्ण विकारात उपयोगी आहे. **हत्तीचे मूत्र**–थोडे कडवट, लवण, मलभेदक, वातनाशक, पित्तप्रकोपक, तीक्ष्ण, क्षार कर्मासाठी कोडावर उपयोजावे. **गाढवाचे मूत्र**–कृत्रिम विष नाशक, मनाच्या रोगावर उपयोगी, तीक्ष्ण ग्रहणी रोग नाशक, दीपन, कृमि, वातकफ नाशक आहे. **उंटाचे मूत्र**–मूळव्याध नाशक, सूज, कुष्ठ, उदर, उन्माद, वात, कृमिनाशक आहे.

सामान्यपणे–गाय, म्हैस, शेळी, आणि मेंढी या स्त्री जातीचे मूत्र घ्यावे. हत्ती, घोडा, गाढव आणि उंट या पुरुष जातीचे मूत्र घ्यावे. ज्या ठिकाणी कोणते मूत्र घ्यावे असे सांगितले नसेल तेथे प्राण्यांच्या नर अथवा मादी पैकी मिळेल त्या प्राण्याचे मूत्र घ्यावे असा संकेत आहे.

**( मूत्रा )**–स्त्री., आग्नेयलूता० **स्वेदजेयम् । पित्तविकारदा च** ( असंउ. ४४ ) **अस्याः दंशो विसर्पी, कृष्ण-शोणितः पूतिश्च भवति । लक्षणानि तु–श्वासकास-ज्वरच्छर्दिमूर्च्छादाहभ्रमः** ( असंउ. ४५ ) आग्नेय धर्माचा एक किडा. घामामुळे उत्पन्न होतो. पित्तविकारकारी. याचा दंश पसरणारा असून त्या जागेतून काळे व घाण रक्त येते आणि श्वास, खोकला, ताप, वांते, मूर्च्छा, दाह, भ्रम हे उपद्रव होतात.

–**कृच्छ्र**–न., रोग०, **कृच्छ्रेण नाम कष्टेन दुःखेन वा मूत्रप्रवृत्तिर्यस्मिन्नसौ रोगविशेषः** ( सुनि. ३.६; सुउ. ५९.१ ) **मूत्रकृच्छ्रमश्मर्यादिविकारे प्रधान-लक्षणभूतमपि भवति** ( सुनि. ३.६ ) **संप्राप्तिः– पित्तं कुद्धं कफानिलौ अनुसृत्य यदा बस्तिं दूषयति तदा मूत्रकृच्छ्रं जायते** ( काचि मूत्रकृच्छ्र० ) **अति-व्यायामात्तीक्ष्णौषधसेवनान्मद्यप्रसंगान्नित्यद्रुतपृष्ठ-यानादानूपमत्स्याध्यशनादजीर्णान्मूत्रकृच्छ्राणि स्युः** ( चचि. २६.३२ ) **एतैर्हेतुभिः कुपिता दोषाः बस्तौ कोपं प्राप्य मूत्रमार्गं यदा परिपीडयन्ति, तदा मूत्रकृच्छ्रं जायते** ( चचि. २६.३३ ) **संख्या-संप्राप्तिः–अष्टौ मूत्रकृच्छ्राणि–वातजपित्तजकफज–सन्निपातजअश्मरीजशुक्रजक्षतजशर्कराजानि** ( चचि. २६.३२-४४ ) **वातजमूत्रकृच्छ्रलक्षणानि–वङ्क्षणव-स्तिमेढ्रे तीव्राः रुजः, अल्पशो मुहुर्मुहुः कृच्छ्रान्मूत्रयति** ( चचि. २६.३४; सुउ. ५९.४; असंनि. ९.६ ) **पित्तजमूत्रकृच्छ्र-लक्षणानि–अत्यन्तदाहपरीतैर्मुष्कमेहनबस्तिभिः पीतं कृष्णं रक्तं वा सरुजं सदाहं, सरक्तमुष्णं कृच्छ्रात् मुहुर्मूत्रयति** ( चचि. २६.३४; सुउ. ५९.५; असंनि. ९.७) **कफजमूत्रकृच्छ्रलक्षणानि–बस्तिमेढ्रयो-र्गौरवं, शोफः स सपिच्छं स्निग्धं शुक्लमनुष्णं च मूत्रं मेहति** ( चचि. २६.३५; सुउ. ५९.६; असंनि. ९.८) **सन्निपातजमूत्रकृच्छ्रलक्षणानि–सर्वाणि रूपाणि भवन्ति, आतुरो रुजाभिर्युक्तस्ताम्यमानो नानावर्णं कृच्छ्रेण मेहति । विशेषास्तत्र मूर्च्छाभ्रम-विलापकाः** ( चचि. २६.३५; सुउ. ५९.७; असंनि. ९.९; काचि. मूत्रकृच्छ्र० )

**अश्मरीजमूत्रकृच्छ्रलक्षणानि–स सेवनीमेहनबस्ति-शूलं विशीर्णधारं मूत्रं करोति, वेदनार्तो मेढ्रं मृद्गाति, मुहुः शकृन्मुञ्चति मेहते च । अश्मरी-क्षोभात्कश्चित्सासृगपि मेहति** ( चचि. २६.३८ ) **शुक्रजमूत्रकृच्छ्रलक्षणानि–बस्तिमेहनशूलवान् सशुक्रं**

कृच्छ्रान् मूत्रयेत् । शूनः स्तब्धो भृशवेदनस्तब्धबस्तिवृषणौ च तुद्ययाताम् ( चचि. २६.४२ ) क्षतजमूत्रकृच्छ्रलक्षणानि–मूत्रवाहीनि स्रोतांसि शल्येन क्षतानि अभिहतानि च यदा भवन्ति तदाऽतिवेदनं मूत्रकृच्छ्रं जायते । तेन च बस्तिकुक्षेर्वेदना मूत्रस्याप्रवृत्तिश्च भवतः । वातबस्तिलक्षणतुल्यानि च लक्षणानि भवन्ति (सुउ. ५९.८-९) शर्कराजमूत्रकृच्छ्रलक्षणानि–हृत्पीडा, कम्पः, कुक्षिशूलं, मन्दवाहित्वं, मूर्च्छा, दारुणो मूत्रावरोधः इत्येवमादीनि च लक्षणानि भवन्ति । शर्करासु मूत्रवेगेन निरस्तासु सतीषु यावदन्या गुडिका स्रोतोमुखं नायाति तावद्वेदना प्रशाम्यति। शर्करायाः स्रोतोमुखप्राप्तायां गुडिकायां सत्यां हृत्पीडादिमूत्राघातान्ताः वेदना भवन्ति ( सुउ. ५९.११-१४ ) बाले मूत्रकृच्छ्रविशेषलक्षणानि–रोमहर्षोऽङ्गहर्षो मूत्रकाले वेदना ओष्ठदशनं पाणिना बस्तिस्पर्शश्च (कासू. २५.२१) उपद्रवाः–मूर्च्छाभ्रमविलापाः कार्श्यमरतिः अरुचिः अनवस्थितिस्तृष्णाशूलविषादार्तिश्च (कासं मूत्रकृच्छ्र) हृत्पीडा, वेपथुः कुक्षौ शूलं, दुर्बलोऽग्निः, मूर्च्छा, दारुणं मूत्रकृच्छ्रं च ( सुउ. ५९.१३ ) चिकित्सा–स्वेद्योऽयं रोगः ( चसू. १४.२२ ) तत्र पथ्यतमः आहारो गोदुग्धम् ( अहृसू. ५.२३ ) वातादिभेदेन यत्र यो विधिरुक्तस्तं तथा स्नेहादिकक्रममपि कुर्यात् । मूत्राघातचिकित्सितमपि कुर्वीत ( सुउ. ५९.१६ ) श्रेष्ठो मूत्रकृच्छ्ररोगहरो वीरतरादिगणः ( अहृसू. १५.२५ )

ज्या विकारामध्ये लघवीला कष्टाने किंवा दुःखाने होते त्यास मूत्रकृच्छ्र असे म्हणतात. मूत्रकृच्छ्र, अश्मरी इ० विकारात हे लक्षण मुख्यत्वे आढळते. संप्राप्ति—दूषित पित्त, कफ आणि वाताशी संयुक्त होऊन जेव्हा बस्तिप्रदेशाला दूषित करते तेव्हा हा विकार होतो. **कारणे**—अतिव्यायामाने, तीक्ष्णौषध सेवनाने, मद्यपानाने, जलद धावणाऱ्या वाहनावर बसून नेहमी प्रवास केल्याने, दलदलीच्या प्रदेशात राहिल्याने, अति मासे खाण्याने, जेवणावर जेवण घेतल्याने व अजीर्णाने प्रकुपित झालेले वायुप्रधान दोष बस्ती मध्ये क्षोभ उत्पन्न करून मूत्रमार्गात अडथळा उत्पन्न करून दुःख देतात तेव्हा मूत्रकृच्छ्र होते. मूत्रकृच्छ्र हा व्याधी आठ प्रकारचा आहे. **वातज मूत्रकृच्छ्र**—आडसंधि, मूत्राशय, शिश्न यामध्ये तीव्र अशा वेदना होतात. थोडे थोडे वारंवार कष्टाने लघवीला होते. **पित्तजमूत्रकृच्छ्र**—अंडकोश, शिश्न व मूत्राशयात अत्यंत दाह करीत पिवळे काळे किंवा लाल असे वारंवार लघवीला होते. त्या वेळी अत्यंत ठणका लागतो. **कफज मूत्रकृच्छ्र**—बस्ति, शिश्न यामध्ये जडपणा, सूज, बुळबुळीत, चिकट, पांढरी किंचित उष्ण अशी लघवी होते.

**संन्निपातज**—तिन्हीही दोषांची चिन्हे त्रिदोषात्मक मूत्रकृच्छ्रामध्ये होतात विशेषतः मूर्च्छा, भ्रम, रडणे. मूतखड्यामुळे होणाऱ्या मूत्रकृच्छ्रात शिश्न आणि अंड यामध्ये व शिवणी मध्ये व मूत्राशयात अतीशय कळा येतात व लघवीची धार फुटून २।३ धारांनी लघवी होते. अति वेदनामुळे रोगी शिश्न चोळतो शौचाला व लघवीला वारंवार जातो. मूत खड्याच्या तीव्र आघाताने क्वचित लघवीतून रक्तसुद्धा पडते. **शुक्रज मूत्रकृच्छ्रा** मध्ये बस्ति आणि शिश्न यामध्ये अत्यंत शूल होऊन शुक्रयुक्त व कष्टाने मूत्रप्रवृत्ति होते. मूत्राशय व अंडकोश यांना सूज येते. बस्ति आणि अंडकोश ताठतात व फार टोचल्याप्रमाणे वेदना होतात.

**क्षतज मूत्रकृच्छ्रामध्ये**—मूत्रवह स्रोतसात जेव्हा एखादे शल्य घुसते तेव्हा व्रण होतो. त्यामुळे बस्तीच्या बाजूला वेदना होतात व लघ्वी बंद होते. वातबस्ति प्रमाणे त्याचीही चिन्हे होतात. **शर्कराजन्य मूत्रकृच्छ्रामध्ये**—हृदयात पीडा, कंप, कुक्षिशूल, मूत्राचा मंद वेग, मूर्च्छा, तीव्रमूत्रावरोध इत्यादी लक्षणे होतात. शर्करा म्हणजे रेव मूत्राबरोबर निघून गेल्याबरोबर वेग थांबतो. परत त्या ठिकाणी दुसरे कण आले की वरील चिन्हे सुरू होतात. ह्या बारीक कणांची गोळी जमून ती स्रोतसांच्या मुखात अडली तर हृदयात पीडा, मूत्राघात इ० वेदना होतात **मूत्रकृच्छ्राची सामान्य चिकित्सा**— या विकारावर घामाकरिता शेक करावा. गाईच्या दुधाचा आहार द्यावा. वातादिकांच्या तारतम्याने स्नेहविधी करावा. तसेच मूत्राघाताचीही चिकित्सा करावी. वीरतरादिगणात मूत्रकृच्छ्र रोग नाशक सांगितलेली औषधे या रोगावर फार उपयोगी आहेत.

बालकाला मूत्रकृच्छ्र झाले असता अंगावर रोमांच येणे, अंग थरथरणे, लघ्वी करताना ओठ दाबणे व

हाताने वारंवार ओटीपोटाला स्पर्श करणे ही लक्षणे होतात.

**उपद्रव**–मूर्च्छा, भ्रम........ कृशता, अस्वस्थता, अरुचि, एका ठिकाणी स्वस्थ न बसणे, तहान, शूल, स्वेद, व पीडा होते. हृदयात पीडा, कंप, कुशीत शूल, जठराग्नि दुर्बल होणे, मूर्च्छा आणि भयंकर मूत्रकृच्छ्र होते.

**–कृच्छ्रप्रतिषेध**–पु., अध्यायसंज्ञा० ( सुउ. ५९.१ )
या नावाचा अध्याय. यात लघ्वीचे कष्ट कमी करणारे उपचार आहेत.

**–कृत्**–वि., मूत्रलः ( अहृसू. ५.४२ )
मूत्र निर्माण करणारे.

**–क्षय**–पु., लक्षण० **मूत्रस्य स्वप्रमाणापेक्षया न्यूनत्वम् लक्षणानि–बस्तितोदाऽल्पमूत्रता च** ( सुसू. १५.११; असंनि. ९.३१ )
मूत्र योग्य प्रमाणापेक्षा कमी होणे. लक्षणे–बस्तीत टोचणी व मूत्र अल्प होणे.

**–क्षरण**–न., लक्षण० **मूत्रस्रवणम्** ( सुचि. ७.३३ )
मूत्राचा स्राव.

**–क्षार**–पु., **मूत्राज्जातः क्षारः** ( चवि. ७.१९ )
मूत्रापासून झालेला क्षार.

**–क्षीण**–वि., **मूत्रं क्षीणं संजातं यस्य सः । सामान्येन दोषधातुमलक्षीणः स्वयोनिवर्धनं यत्तदन्नपानं प्रकाङ्क्षति । मूत्रक्षीणः पेयामिक्षुरसं क्षीरं सगुडं बदरोदकं त्रपुसैर्वारुकाणि चाभिलषति** ( सुसू. १५: ड. २९.३१ )
ज्याचे मूत्र क्षीण झाले आहे असा. अशा रोग्याला मूत्र वाढविणारे जे जे अन्नपान तो इच्छितो ते द्यावे. पेज, उसाचा रस, दूध, गूळ घालून बोराचे पाणी द्यावे. काकडी, खरबूज यांची तो इच्छा करतो.

**–ग्रन्थि**–पु., **रोग०, बस्तिद्वारस्याभ्यन्तरे, वर्तुलः अचलो मूत्रवाहिस्रोतोनिरोधकारी वेदनावान्ग्रन्थिः सहसा जायते स मूत्रग्रन्थ्याख्यो मूत्राघातः** ( सुउ. ५८.१८-१९; असंनि. ९.२७ )
मूत्रग्रंथी नावाचा विकार. बस्तिद्वाराच्या मध्ये गोल, अचल, मूत्रवाहिस्रोतस रुद्ध करणारी वेदनायुक्त गाठ एकदम होते.

**–ग्रह**–पु., **मूत्रस्याप्रवृत्तिः** ( चचि. १३.३८ )
**मूत्रकृच्छ्रम्** ( काचिमूत्रकृच्छ्र० )
मूत्र अडणे, लघवी अडणे.

**–ग्रहण**–वि., **मूत्रातिप्रवृत्तिरोधकम्** ( असंसू. १५.३३ )
मूत्राची अति प्रवृत्ति थांबवणारे.

**–ज**–वि., **मूत्ररोधजः** ( अहृसू. ४.६ )
मूत्राच्या अवरोधापासून झालेला.

**–जठर**–न., **रोग०, मूत्रवेगेऽवरुद्धे सति तदुदावर्तहेतुनाऽपानवायुः कुपितः सन्नुदरं पूरयेत् स ततो नाभेरधोभागे सतीव्रपीडमाध्मानं जनयेत् । मूत्रपुरीषमार्गावरोधकोऽयं मूत्रजठराभिधो व्याधिर्ज्ञेयः । द्वादशमूत्राघातेष्वेकः । हेतुः–मूत्रवेगावरोधजः उदावर्तः । संप्राप्तिः–कुपितापानेनोदरपूरणम् । लक्षणम्–अधःस्रोतोनिरोधाध्मानादि । चिकित्सा–मूत्रविरेचनीं तत्र चिकित्सां प्रयुंजीत** ( सुउ. ५८.१३-१४; चसि. ९.३०; असंनि. ९.२५ )
मूत्र जठर नावाचा रोग. मूत्रवेगावरोध केला असता अपानवायु अडतो, वर जाऊन पोटात पसरतो नंतर बेंबीच्या खाली तीव्रपीडायुक्त पोट फुगते. लघ्वी आणि मल प्रवृत्ती अडवणारा असा हा मूत्रजठररोग आहे. मूत्राघाताच्या १२ प्रकारांपैकीच हा एक प्रकार. मूत्रावरोधाने वायु कुपित होऊन तो ऊर्ध्व होणे हेच याचे कारण.

**संप्राप्ती**–कुपित अपानाने पोट व्यापणे. **लक्षण**–अधोमार्गाच्या स्रोतसांचा अवरोध.

**–दर्शन**–न., **व्रणमुखे मूत्रागमनम्** ( अहृसू. २८.९ )
उदरात शल्य असेल तेथील व्रणातून मूत्र येणे.

**–दोष**–पु., **लक्षण०, मूत्रदुष्टिः** ( चनि. ४.४७ )
मूत्र दोष, लघवीतील दोष.

**रोग०, मूत्रकृच्छ्रम्** (सुनि. ३.२८; सुचि. ३७.१२५; सुउ. ५८.३६) कष्टाने लघ्वी होणे.

**–दोषाङ्कुश**–पु., **पारदयोग० अभ्रकपारदस्वर्णलोहवङ्गशिलाजतूनां समांशान् वसुकाथेन मुसलीरसेन गोक्षुरकाथेन च दिनत्रयं संमर्दयेत् । वल्लद्वयमात्रोपसेवितोऽयं वातकुण्डलिकाऽऽनाहमूत्रावरोधाश्मरीरोगान्हन्यात्** ( र. १७.८, – १० )
मूत्रदोषांकुश नावाचे सिद्धौषध. अभ्रक, पारा, सुवर्ण, लोह, कथील, मनशील, शिलाजतु समभाग वसूचा व गोखरूचा काढा, मुसळीचा रस यांनी तीन दिवस घोटावे. मात्रा दोन वाल. वातकुंडलिका, पोटफुगी, मूत्राचा अवरोध, मूतखडा, याचा नाश करतो.

**–धारासङ्ग**–पु., **लक्षण० मूत्रस्य धारायाः संगः** ( सुनि. ३.७ ) मूत्राची धार बंद पडणे.

**–निग्रह**–पु., **मूत्रवेगस्य निरोधः** ( चसू. ७.६ )
मूत्राचा वेग अडणे.

**-पुरीषगन्धि**-वि., मूत्रपुरीषयोः गंधो यस्मिन् तत् शुक्रम् ( सुशा. २.४ )
मूत्र आणि मल यांचा गंध असणारे शुक्र.

**-प्रतीघात**-पु., लक्षण० मूत्रनिरोधः ( सुनि. ३.९ )
मूत्राचा अवरोध. लघ्वी अडणे.

**-प्रसेक**-पु., शारीर० मूत्रमार्गः, बस्तिमुखाश्रयं स्रोतो, येन मूत्रं बहिः स्रवति ( सुचि. ७.३३ )
मूत्राचा मार्ग. बस्तीच्या तोंडाशी असलेले स्रोतस ज्याने मूत्र बाहेर सोडले जाते.
अभीक्ष्णम् अल्पाल्पं मूत्रप्रवृत्तिः ( सुशा. १०.७ )
थोडा थोडा वारंवार मूत्राचा स्राव.

**-फला**-स्त्री., कर्कटी (रा. ७.२५२; पृ.४१) काकडी.

**-मार्ग**-पु., शारीर० मूत्रवाहि स्रोतः, मूत्रवहनस्य मूत्रविसर्जनस्य च स्रोतः। मूत्रपथः ( सुसू. ७.१४ )
मूत्रमार्ग. मूत्रवाहक स्रोतस. मूत्र वाहणे व मूत्र विसर्जन करणारे स्रोतस.

**-राग**-पु., लक्षण० मूत्रस्य रक्तवर्णता ( काखिल० २.४४ ) मूत्राची लाली—लाल रंग.

**-रुजा**-स्त्री., लक्षण० मूत्रप्रवृत्तौ वेदना ( सुउ. ५८.३५ ) लघ्वी करताना वेदना.

**-रोग**-पु., प्रमेहादयो रोगाः ( र. १७.६८ )
मूत्राचे रोग.

**-रोध**-पु., मूत्रवेगनिग्रहः ( अहसू. ४.५ )
मूत्राचा वेग अडविणे.

**-ल**-वि., मूत्रवर्धकम् ( अहसू. ६.४ )
मूत्रवर्धक, मूत्र प्रवृत्त करणारे.

**(-ला )**-स्त्री., कर्कटी ( रा. ७.२५२; पृ. ४१ )
काकडी.

**-वर्ति**-स्त्री., योग०, उदरमहारोगकासश्वासपीनसप्रसेकश्वयथुगुल्मपाण्डुरोगकृमिणकोष्ठारोचकाविपाकोदावर्तघ्नी ( असंचि. १७; सुचि. १४.११ )
मूत्रवर्ति. औषधाचे नाव. ही उदर, महारोग, खोकला, श्वास, पडसे, तोंडाला पाणी सुटणे, सूज, गुल्म, पांडु, कृमि, अरुचि, विपाक न होणे, व उलटे पोट फुगणे नाशक.

**-वर्तिक्रिया**-स्त्री., मूत्रवर्तिचिकित्सा ( सुचि. २३.१२; सुउ. ४२.५८; सुचि. १४.११ )
गोमूत्रादि मूत्रगणात खलून औषधाची केलेली गोळी. ( मेहादिविकारासाठी )

**-वह ( स्रोतस् )**-न., शारीर० मूत्रवहनार्थं स्रोतोविशेषः । मूत्रवहे द्वे तयोर्मूलं बस्तिर्मेढ्रं च । तत्र विद्धस्यानद्धबस्तिता मूत्रनिरोधः स्तब्धमेढ्रता च ( सुशा. ९.१२ ) मूत्रवहानां स्रोतसां बस्तिर्मूलं वङ्क्षणौ च । अतिसृष्टमतिबद्धं प्रकुपितमल्पाल्पमभीक्ष्णं वा बहलं सशूलं मूत्रयन्तं दृष्ट्वा मूत्रवहान्यस्य स्रोतांसि प्रदुष्टानीति विद्यात् । क्षीणस्याभिक्षतस्य च मूत्रितोदकभक्ष्यस्त्रीसेवनात् मूत्रनिग्रहान्मूत्रवाहीनि दुष्यन्ति ( चवि. ५.२० )
मूत्रवह स्रोतस, ही दोन. त्याचे मूळ एक बस्ति व एक शिश्न. त्यावर आघात झाला असता बस्ति फुगणे, मूत्र अडणे व शिश्न ताठणे. मूत्रवह स्रोतांचे एक मूळ बस्ती व एकमूळ वंक्षण (मूत्र पिंड). लघ्वीला खूप होणे, अति कमी होणे, अति दोष युक्त होणे, थोडे थोडे व वारंवार होणे, दाट होणे, शूलयुक्त होणे, यावरून ही स्रोतसे दुष्ट झाली आहेत असे समजावे. क्षीण व जखमी व्यक्तीची तसेच लघ्वी लागल्यानंतर आहार, पाणी व स्त्री यांचे सेवन करणारा, लघ्वीचा अवरोध करणारा, यांची मूत्रवह स्रोतसे दुष्ट होतात.

**-वहा ( नाडी )**-शारीर० मूत्रवाहकनालिका ( सुनि. ३.२१ ) मूत्र वहन करणारी नळी.

**-वाहि( स्रोतस् )**-न., मूत्रवहस्रोतः (चवि. ५.२०; असंशा. ६ ) मूत्रवह स्रोतस.

**-विनिग्रह**-पु., लक्षण०, मूत्रस्याप्रवृत्तिः ( सुउ. ५५.१५ )
मूत्राची अप्रवृत्ती, लघ्वी न होणे, अडणे.

**-विरजनीय**-वि., मूत्रं नयति विरागमथवा मूत्रस्य दोषसंबन्धिनिरासं करोति नाम प्राकृतं वर्णं स्थापयति मूत्रविरजनीयम् ( चसू. ४.८ ) मूत्रविरजनीयगणो महाकषायवर्गोक्तानामेकः ( चसू. ४.१५; असंसू. १५.३४ )
मूत्रातील दोषांची दुष्टि घालवणारे द्रव्य. मूत्राला स्वाभाविक वर्ण आणणारे द्रव्य. महाकषाय वर्गांतील एक गण.

**-विरेककर**-वि., मूत्रविरेचनीयम् (असंसू. १६.१८)
मूत्राचा अधिक स्राव करणारा.

**-विरेचनीय**-वि., मूत्रस्य विरेचनं करोतीति ।
पु., महाकषायवर्गे एको गणः ( चसू. ४.१५; असंसू. १५.३५ )
मूत्राचे प्रमाण वाढवून स्राव करणारे महाकषाय वर्गातील हा एक गण आहे.

**–विशोधनद्रव्य**–न., मूत्रस्य शोधनकरं द्रव्यम्। यथा तृणपञ्चमूलानि, गोक्षुरकं, कूष्माण्डकः पाषाणभेदप्रभृति ( सुचि. ७.३५ )
मूत्राची शुद्धि करणारी द्रव्ये. जसे गवती पंचमुळे, गोखरू, कोहळा, पाषाणभेद इत्यादी.

**–विष**–वि., सविषमूत्रयुक्तः ( प्राणिविशेषः ) मूत्रे विषं येषां, ते मूत्रविषाः। चिपिटपिच्चिटककषायवासिकसर्षपकतोटकवर्चःकीटकौण्डिन्यकाः शकृन्मूत्रविषाः ( सुक. ३.५ )
ज्या प्राण्यांच्या मूत्रात विष आहे असे प्राणी. त्यांची नावे वर आहेत.

**–विषा**–स्त्री., लूता० ( सुक. ८.१११ )
मूत्रलूता, एक किडा.

**–वृद्धि**–स्त्री., बहुमूत्रता ( सुसू. १५.१५ )
लघवीला पुष्कळ होणे.
**वृद्धिरोग०, वेध्योऽयम्** ( सुसू. २५.१० ) **मूत्रवृद्धिरोगहेतुः मूत्रसंधारणशीलस्य कुपितो वायुः मूत्रवृद्धेः कारणम्। लक्षणं–सा वृद्धिः अम्बुपूर्णा दृतिरिव क्षुभ्यति, मूत्रकृच्छ्रं, वृषणयोर्वेदनां, कोशयोश्च श्वयथुमापादयति** (सुनि. १२.६) **मूत्रवृद्धिस्रावणार्थं नाडीयन्त्रमुपयोक्तव्यम्** ( सुसू. ७.१३ )
अंडात मूत्रदोषांमुळे वाढ होणे. हा रोग वेध करण्यास योग्य. **कारण**–लघ्वीला लागले असताही न जाण्याची खोड असणाराचा वायु प्रकुपित होऊन हा रोग करतो. पाणी भरलेल्या पखालीतल्या पाण्याच्या हालण्यासारखी संचित पाण्याची हालचाल, कष्टाने लघ्वी, वृषणात वेदना, व अंडकोशांना सूज येते. संचित द्रवाचा स्राव करण्याकरिता नाडीयंत्राचा उपयोग करावा.

**–वृद्धिजविकार**–पु., मूत्रवृद्धिजन्यविकारः ( असंसू. १९.१५ ) मूत्राच्या वाढीने होणारा रोग.

**–वृद्धिनाडीयन्त्र**–न., नाडीयन्त्र० विंशतिनाडीयन्त्रेषु एकम्। मूत्रवृद्धिस्रावणार्थम् इदमुपयोज्यम् ( सुसू. ७.१३ )
मूत्रवृद्धिनाडीयंत्र, वीस नाडीयंत्रापैकी एक. वृद्धींतील स्राव करण्याकरिता उपयुक्त.

**–वैरेचनी चिकित्सा**–स्त्री., ( परिव० ) मूत्रस्य विरेचनं यया क्रियते, सा चिकित्सा ( चसि. ९.३० )
मूत्राचे विरेचन जिने होते ती चिकित्सा.

**–वैवर्ण्य**–न., लक्षण० मूत्रस्य प्राकृतवर्णहानिः ( चसू. १७.७१ ) मूत्राचा नेहमीचा रंग नसणे.

**–शर्करा**–स्त्री., रोग०, अणुशो भिन्ना मूत्राश्मर्येव। वायौ प्रतिलोमे निरुद्धाते, अनुलोमे च मूत्रेण सह निर्गच्छति। मूत्रमार्गे चेत्सक्ता, दौर्बल्याङ्गसदनकार्श्य कुक्षिशूलारुचिपाण्डुत्वमुष्णवाततृष्णाहृत्पीडनवम्यादिकं च करोति। तारुण्येऽप्यपचारेण जायते मूत्रशर्करा ( र. १७.४; सुनि. ३.१४-१७ )
मूत्रशर्करा– मुतखडा फुटल्याने होणारे कण म्हणजे मूत्रशर्करा. वायु उलट गतीने अडला तर हे कंकर आत रहातात व वात व्यवस्थित असला तर मूत्राबरोबर बाहेर पडतात. मूत्रमार्गात अडले तर दुर्बलता, अंग गळणे, कृशता, कुशीत शूल, अरुचि, पांडुत्व, उष्णवात, तहान, हृदयात वेदना, वांती, इत्यादी लक्षणे होतात. तारुण्यात मूत्रवेग, शुक्रवेगाचे धारण, मूत्रवेग असतांच स्त्रीसमागम करणे अशा केलेल्या अपचाराने मूत्रशर्करा होते.

**–शुक्र**–न., रोग०, मूत्राघात० यः पुरुषः संजातमूत्रवेगः सन् मैथुनं करोति, तस्य भस्मोदकप्रतीकाशं मूत्रयुतं रेतो मूत्रस्यादौ कदाचित् पश्चाद्वा वायोर्विचित्रक्रियाकरत्वात् प्रवर्तते तन्मूत्रशुक्रमुच्यते ( सुउ. ५८.२०-२१; असंनि. ९.२८ )
मूत्रशुक्र विकाराचे नाव. एक मूत्राघात. जो लघ्वी लागली असता मैथुन करतो, त्याचे वीर्य मूत्रयुक्त भस्म कालवलेल्या पाण्याप्रमाणे मूत्राच्या आधी किंवा नंतर जाते. वायूच्या विचित्र कार्यकारित्वाने हे होते. ह्या विकाराला मूत्रशुक्र असे म्हणतात.

**–शूल**–पु., लक्षण० यदा मेढ्रान्त्रमर्दको वायुः अवरुध्य मूत्रं गृह्णाति, तदा नाभ्यां वङ्क्षणपार्श्वेषु कुक्षौ च शूलो जायते, स मारुतान्मूत्रशूलो ज्ञेयः ( सुउ. ४२.१३५ )
मूत्रशूल. शिश्न व आंत्र यात प्रकुपित झालेला वायु जेव्हा न सरता अडतो व मूत्रालाही अडवतो तेव्हा बेंबी, कुशी, फासळ्या व जांघेच्या दोन्ही बाजू यात शूल होतो तो.

**–शोधन**–वि., मूत्रमतिवाहयतीति मूत्रातिवाहकं नाममूत्रशोधकम् ( अहसू. ५.४७ )
मूत्राचा अधिक स्राव करणारे.

**–संक्षय**–पु., रोग० रूक्षस्य ग्लानदेहस्य बस्तिगतपित्तमारुतौ कुपितौ सदाहवेदनं कष्टजननं मूत्रक्षय-

मुत्पादयतः। मूत्रस्य शोषणादत एव चात्यल्पत्वात्तस्याप्रवृत्तिः ( सुउ. ५८.१७ )

मूत्राचा क्षय.

रूक्ष व ग्लानी असलेल्या शरिरातील बस्तीतील दुष्ट वात पित्त दाहयुक्त वेदना, मूत्राची कष्टाने उत्पत्ति, व मूत्राचा क्षय करतात. मूत्राचे शोषण होते. त्यामुळे ते अत्यल्प म्हणून त्याची प्रवृत्ति कमी किंवा मुळीच नसते.

**-सङ्ग**-पु., लक्षण०, मूत्रस्याप्रवृत्तिः, मूत्रावरोधः, अयं मारुतवैगुण्याद्भवति ( चसि. ३.६०; चचि. १३.४१ ) मूत्राघातभेदः ( सुनि. ८.३ ) गर्भप्रस्रंसनकाले गर्भिण्याः लक्षणमेकम् ( सुशा. १०.५७ ) शकृतः प्रतीघाताद् विगुणतां प्राप्तो वायुः सशूलमाध्मानं मूत्रसंगं च करोति ( सुउ. ५९.९-१० )

मूत्र अडणे, मूत्राचा अवरोध. हा वाताच्या दुष्टीने होतो. मूत्राघाताचा प्रकार, गर्भस्राव किंवा प्रसूतीच्या वेळी होणाऱ्या लक्षणापैकीच हे एक लक्षण आहे. शौचाचा वेग अडविण्याच्या खोडीने दूषित झालेला वायु शूल, पोटफुगी व मूत्राचा अवरोध करतो.

**-संगिनी**-स्त्री., सूतिकारोग०, दुष्प्रजातायाश्चतुःषष्टिरोगाणामेकतमो योनिगतो रोगः। प्रसवानन्तरं मारुतवैगुण्याज्जाता मूत्राप्रवृत्तिः ( काखिल. ११.७-१४ )

या नावाचा बाळंतिणीचा एक रोग. प्रसूती नीट न होणाऱ्यांना होणाऱ्या ६४ रोगांपैकी एक. प्रसूतीनंतर वाताच्या दुष्टीने मूत्राची प्रवृत्ति रोकली जाते.

**-संग्रहणीय**-वि., मूत्रातिप्रवृत्तिरोधनम्

पु., द्रव्यगण० जम्ब्वाम्रप्लक्षवटकपीतनोदुम्बराश्वत्थभल्लातकाश्मन्तकसोमवल्का इति दशेमानि मूत्रसंग्रहणीयानि भवन्ति ( चसू. ४.१५ )

मूत्रसंग्रहणीय कार्य करणारी औषधे. मूत्राची अति प्रवृत्ति कमी करणारे—पिंपरी, जांभूळ, आंबा, वड, सिसव, उंबर, पिंपळ, बिबा, आपटा व खैर.

**-संपृक्त**-वि., मूत्रेण सहितः मूत्रेण सह प्रवृत्तः ( सुनि. ३.४ ) मूत्राबरोबर आलेला (कफ).

**-साद**-पु., रोग० मूत्रावसादः, मूत्राघातप्रकार० ( असंनि. ९.३२ )

मूत्राघाताचा प्रकार. मूत्रप्रवृत्ति कमी होणे.

**-स्रावि ( व्रण )**-पु., यस्मान्मूत्रस्रावो भवति, सः। अश्मरीशस्त्रकर्मणि अविधिना भिन्ने मूत्राशये मूत्रस्रावी व्रणो भवति। स तु यत्नेनोपक्रान्तो रोहति ( सुचि. ७.३३ )

ज्या व्रणातून मूत्राचा स्राव होतो आहे असा व्रण, मूतखड्याच्या शस्त्रक्रियेत विधि सोडून अयोग्य रीतीने भेद केला तर मूत्राशयात मूत्रस्रावी व्रण होतो, तो यत्नाने उपचारला तर भरून येतो.

**-स्रोतस्**-न., मूत्रमार्गः ( सुनि. १३.५३ )

मूत्राचा मार्ग.

**-स्रोतःपथ**-पु., मूत्रमार्गः ( सुशा. ४.२२ )

मूत्रमार्ग.

**मूत्रण**-न., मेहनम् ( चसू. १८.४ ) शिश्न, मेहन.

**मूत्राघात**-पु., रोग०, मूत्रावरोधः, मूत्रदुष्टिः, संख्या—सुश्रुतसंहितायां द्वादश मूत्राघाताः वर्णिताः। वातकुण्डलिका, अष्ठीला ( वाताष्ठीला ), वातबस्तिः, मूत्रातीतो, मूत्रजठरो, मूत्रोत्संगो, मूत्रक्षयो, मूत्रग्रन्थिर्मूत्रशुक्रमुष्णवातो मूत्रौकसादः ( कफजः ) मूत्रौकसादः ( पित्तजः ) ( सुउ. ५८.३-४ ) अष्टाङ्गसंग्रहे तु अधिकानि वातजपित्तजकफजसन्निपातजानि चत्वारि मूत्रकृच्छ्राणि, वात-पित्त-श्लेष्मशुक्राश्मर्यश्चतस्रः। एवं मिलित्वा विंशतिर्मूत्राघाताः वर्णिताः सन्ति ( असंनि. ९.२ ) माधवनिदाने तु सुश्रुतस्य द्वादश, बस्तिकुण्डलाख्यमेकमिति त्रयोदश मूत्राघाताः वर्णिताः ( मा. ) रौक्ष्याद्वेगविघातात्कुपितो विगुणश्च वायुः बस्तौ मूत्रं संगृह्य कुण्डलीकृतश्चरति। ततोऽल्पाल्पमथवा सरुक्‌ शनैः शनैर्मूत्रं सृजेत्। तं सुदारुणं व्याधिं वातकुण्डलिकां विद्यात्। गुदबस्तिस्थोऽपानो वायुरष्ठीलावत् अचलमुन्नतं घनं ग्रन्थिं करोति। तेन च विण्मूत्रानिलसंगः आध्मानं वेदना च बस्तौ जायते। तां वाताष्ठीलेति विदुः। यो मूत्रस्य वेगं विधारयेत्तस्य बस्तिगतोऽनिलः बस्तेर्मुखं निरुणद्धि। तेन बस्तिकुक्षिनिपीडितो मूत्रसंगो भवेत्। स कष्टसाध्यो व्याधिर्वातबस्तिरिति विज्ञेयः। यो मूत्रस्य वेगं संधार्य भूयोभूयः स्रष्टुमिच्छति, तस्य मूत्रं नाभ्येति। यदि वा कथंचित् संप्रवर्तते पुनः पुनः प्रवाहतो मन्दरुजमल्पमल्पं चागच्छति मूत्रवेगविघातजं तं मूत्रातीतमिति विद्यात्। उदावर्तहेतुना मूत्रस्य विहते वेगे कुपितोऽपानो वायुर्भृशमुदरं पूरयेत्। नाभेरधश्च तीव्रवेदनम् आध्मानं जनयेत् तमधःस्रोतोनिरोधनं मूत्रजठरं

विद्यात् । बस्तौ अथवा नाले मणौ वा यस्य प्रवृत्तं मूत्रं सज्जेत प्रवाहतो वा सरक्तमल्पमल्पं सरुजं नीरुजं वा शनैर्वा स्रवेत् स विगुणानिलजो मूत्रसंगसंज्ञितो व्याधिः । रूक्षस्य क्लान्तदेहस्य बस्तिस्थौ पित्तमारुतौ सदाहवेदनं कृच्छ्रं कुर्यातां तदासौ मूत्रक्षय इति ज्ञेयः । अभ्यन्तरे बस्तिमुखे मूत्रमार्गनिरोधनः अश्मरिलक्षणो वृत्तोऽल्पः स्थिरो वेदनावांश्च ग्रंथिः सहसा जायते स मूत्रग्रन्थिरित्युच्यते । संजातमूत्रवेगो यः पुरुषः मैथुनं करोति तस्य भस्मोदकप्रतीकाशं मूत्रयुतं रेतः मूत्रस्यादौ कदाचित् पश्चाद्वा वायोर्विचित्रकरत्वात्प्रवर्तते तं मूत्रशुक्रमित्याहुः । व्यायामाध्वातपैर्वातावृतं पित्तं बस्तिं प्राप्य बस्तिं मेढ्रं गुदं च प्रदहन् मूत्रं हारिद्रमथवा सरक्तं रक्तमेव वाऽधः कृच्छ्रात्स्रावयेत्। रोगं तमुष्णवातं वदन्ति। यदा मूत्रं विशदं पीतकं सदाहं बहलं शुष्कं रोचनाचूर्णसन्निभं च भवति तदा तं रोगं पित्तकृतं मूत्रौकसादमिति वदन्ति। यदा तदेव मूत्रं पिच्छिलं संहतं श्वेतं तथा कृच्छ्रात्प्रवर्तनं शङ्खचूर्णप्रपाण्डुरं शुष्कं च भवति तदा तमामयं कफकृतं मूत्रौकसादं विद्यात् (सुउ. ५८.५-२६) मूत्राघाते सामान्यचिकित्सा—स्वेद्योऽयं व्याधिः ( चसू. १४.२१ ) वीरतर्वादिगणोक्तानि द्रव्याणि कषायद्वारोपयोज्यानि ( सुसू. ३८.१३ )

कषायकल्पसर्पींषि, भक्ष्यान् लेहान्, क्षीराणि क्षारमद्यासवस्वेदान् उत्तरबस्तीन्स्नेहविरेचनं अश्मरिनाशनं च विधिं मतिमान्वैद्यो मूत्राघाते समाचरेत् । मूत्रोदावर्तयोगांश्च कार्त्स्न्येनात्र प्रयोजयेत् ( सुउ. ५८.२७-२८ )

मूत्राघात, मूत्राचा अवरोध, मूत्रदुष्टि. या विकारांची संख्या सुश्रुतसंहितेमध्ये बारा दिलेली आहे. नावे वर आहेत. या बारांशिवाय अष्टांगसंग्रहात ८ अधिक आहेत. माधवनिदानात बस्तिकुंडल हा एक अधिक धरून तेरा. **वातकुंडलिका**— रूक्षता, वेगावरोध यामुळे कुपित वायु मूत्राला अडवून वेटोळयासारखा गोल गति धारण करतो, तेव्हा थोडे थोडे पीडायुक्त थोड्या थोड्या वेळाने लघ्वीस होते. **वाताष्ठीला**— गुद व बस्ति यातील अपान वायु आठळीप्रमाणे, न हालणारी उंच व घट्ट अशी गाठ करतो, त्यामुळे वात मूत्र व मळ यांचा अवरोध, पोटफुगी व बस्तीत वेदना होते. **वातबस्ति**— मूत्राच्या वेगाच्या अवरोधाच्या सवयीने बस्तीतील वायु त्याचे तोंड बंद करतो. त्यामुळे लघ्वी साठते आणि बस्ति व कुशी यात पीडा होते. हा कष्टाने साध्य. **मूत्रातीत**— ज्याला मूत्रवेग अडवण्याची खोड आहे त्याला बारंवार लघ्वीस जाऊनही लघ्वीस होत नाही, कदाचित झाल्यास ती थोडी थोडी व पीडायुक्त होते. **मूत्रजठर**— मल मूत्र विसर्जन न करण्याच्या खोडीमुळे कुपित झालेला अपान वायु पोट फुगवतो, बेंबीच्या खालच्या भागातील स्रोतसांचा अवरोध करून तीव्र वेदना उत्पन्न करतो.

**मूत्रसंग**—बस्तीत अथवा शिश्नाच्या नळीत अथवा पुढील मण्यात आलेले मूत्र वायूच्या दुष्टीमुळे अडते, तो कुंथतो, व रक्तयुक्त थोडे थोडे वेदनायुक्त किंवा वेदनाविरहित हळू हळू लघ्वी करतो. **मूत्रक्षय**—रूक्ष व क्षीण मनुष्याला बस्तीत पित्त व वात दाह व वेदनायुक्त आणि कष्टाने लघ्वी होते. **मूत्रग्रंथी**—बस्तिमुखाच्या आत मूत्रमार्गाचा अवरोध करणारी दगडासारखी वाटोळी लहान घट्ट व वेदना करणारी गाठ एकदम होते. **मूत्रशुक्र**—मूत्राचा वेग आला असता जो मैथुन करतो त्याचे शुक्र मूत्रात मिसळून लघ्वीचे अगोदर किंवा नंतर भस्माच्या रंगासारखे होते. वायूच्या विषम कार्यपद्धतीमुळे हे होते. **उष्णवात**—व्यायाम, वाटचाल, ऊन्ह यांनी वायु पित्ताला आवृत करून बस्तीत येतो आणि बस्ति शिश्न व गुद यात दाह करून पिवळे लाल मूत्र किंवा केवळ रक्तच कष्टाने लघ्वीच्या मार्गाने उत्सर्जित करतो. **पित्तकृत् मूत्रौकसाद**—मूत्र स्वच्छ पिवळट, दाह युक्त, दाट, शुष्क, व गौरोचन चूर्णाप्रमाणे होते. **कफकृत् मूत्रौकसाद**—मूत्र बुळबुळीत शंखचूर्णासारखे पांढरे, खूप दाट होते व ते ऊन इत्यादींनी सुकले तर शंखचूर्णासारखे पांढरे होते. **सामान्य उपचार**—शेकणे. वीरतरु ( अर्जुनसादडा इ० ) गणाने सिद्ध तूप निरनिराळे लेह, क्षार, मद्य, आसव, दूध, खाद्य पदार्थ उपयोगात आणावे. उत्तर बस्ति व अश्मरी नाशक स्निग्ध रेचक द्यावे मूत्राघात झाला तर मूत्रोदावर्तावरील योग द्यावे.

**मूत्राघातप्रतिषेध**—पु., अध्यायसंज्ञा० ( सुउ. ५८.१ ) अध्यायाचे नाव. मूत्राघाताचे उपचार यात आहेत.

**मूत्रातीत**-पु., न., रोग०, त्रयोदशबस्तिविकारेष्वेकः ( चसि. ९.३५ ) मूत्राघातप्रकार०, **प्रवृत्तोन्मुखं मूत्रस्य वेगं संधार्य पुनः मूत्रप्रवृत्त्याकाङ्क्षायां तन्न प्रवर्ततेऽथवा कथंचिदल्पाल्पं मन्दरुजं संप्रवर्तते। मूत्रातीताख्योऽसौ मूत्रवेगविघातजो ज्ञेयः। अत्र मन्दरुगल्पप्रवर्तनं लक्षणम्** ( सुउ. ५८.११-१२; असंनि. ९.२४ )

मूत्रातीत नावाचा रोग. तेरा बस्तिविकारांतील एक, मूत्राघाताचा प्रकार. लघ्वीला न जाण्याच्या खोडीने, वेळेवर लघ्वीला न जाता, अवेळी लघ्वीला गेल्यावर, त्या वेळी होत नाही किंवा झाली तर मोठ्या कष्टाने थोडी थोडी व थोडी वेदना होते. मूत्रवेग अडवल्याने होणारा हा मूत्रातीत नावाचा रोग होय. थोडी पीडा व थोडे थोडे लघ्वीला होणे हे याचे लक्षण.

**मूत्रातुर**-वि., **मूत्ररोगपीडितः** ( सुचि. ३३.१४ )
मूत्ररोगाने पीडित.

**मूत्राधार**-पु., **मूत्रस्याधारः, मूत्राशय इत्यर्थः** ( असंशा. ५.४६ ) मूत्राशय. मूत्राचा आधार.

**मूत्रार्ति**-स्त्री., मूत्रपीडा (सुचि. ३८.८-९) मूत्राची पीडा.

**मूत्रावसाद**-पु., रोग० **मूत्राघातप्रकार० मूत्रौकसादः** ( असंनि. ९.३२ )

मूत्राघाताचा प्रकार. पहा 'मूत्रौकसाद'.

**मूत्रावृतवात**-पु., **मूत्रेणावृतो वातः, तत्र मूत्रविरेचनानि औषधानि स्वेदाः उत्तरबस्तयश्चोपयुञ्जीत** ( चचि. २८. १९७ )

मूत्राने आवृत वायु. **उपचार**—मूत्ररेचके, शेकणे व मूत्रमार्गात बस्ती देणे.

**मूत्राशय**-पु., **मूत्रस्याशयः अवस्थानप्रदेशः बस्तिः** (सुशा. ५.८) **सप्ताशयेषु एकः। सद्यःप्राणहरमर्म। बस्तिस्तु स्थूलगुदमुष्कसेवनीशुक्रमूत्रवाहिनीनां नाडीनां मध्ये मूत्राधारोऽम्बुवहानां सर्वस्रोतसामुदधिरिवापगानां प्रतिष्ठा** ( चसि. ९.४ ) **नाभिपृष्ठकटीमुष्कगुदवङ्क्षणशेफसां मध्ये एकद्वारस्तनुत्वक्कोऽधोमुखो बस्तिः। मलाधारो मूत्राशयः, श्रेष्ठं प्राणायतनम्** ( सुनि. ३.१८-२३ )

बस्ति, मूत्रसंचयस्थान, मूत्राचा आशय. शरिरातील एकूण सात आशयांपैकी एक, सद्यःप्राणहर मर्म. हा मोठे गुद, वृषण, शिवण, शुक्र व मूत्रवाहिनी नाडींच्या मध्ये नद्यांचा जसा समुद्र तसा सर्व जलवह स्रोतसांचा मूत्राचा आधार म्हणून शरिरात आहे. नाभि, पाठ, कंबर (पक्काधान, मलाधार, पुरीषाधार) वृषण, गुद, वंक्षण ( मूत्रपिंड ) व शिश्न यांमध्ये एक द्वार-मुख असलेला, पातळ त्वचेचा, खाली मुख असलेला हा बस्ति अवयव आहे. मूत्रमलाधार असे प्राणाचे श्रेष्ठ स्थान आहे.



**मूत्राष्टक**-न., **अष्टमूत्रसमूहः। गोऽजाविमहिषीगजाश्वोष्ट्रखरोद्भवानि मूत्राणि समाहृतानि मूत्राष्टकमिति आहुः** ( धनि. ७.६५ पृ. ३०९; धनि. ७.७३ पृ. ३०८ )
आठ प्रकारची मूत्रे. गाय, शेळी, मेंढी, म्हैस, हत्तीण, उंटीण, गाढवी, घोडी, यांची मूत्रे ही आठ. या सर्वांना मिळून मूत्राष्टक म्हणतात.

**मूत्रासव**-पु., **आसुत० कुष्टे समुपयोज्यः** (सुउ. ५७.१४; सुउ. ४४.३६ ) **पाण्डुरोगे पानार्थं प्रशस्तः, अरोचकव्याधिनाशार्थं विरेचनार्थं चाप्युपयुक्तः** ( सुसू. ४४.३० )

मूत्राचे आसव, गोमूत्राचे आसव. ते रेचक; अरुचि, कुष्ठ, पांडुरोग यावर उपयुक्त.

**मूत्रासुत**-पु., **अवलेह० मूत्रे उषितः पाण्डामयघ्नः** (सुउ.४४.२३) मूत्राचा अवलेह. हा पांडुरोगनाशक.

**मूत्रोत्सङ्ग**-पु., **रोग० मूत्राघात०** ( सुउ. ५८.१५-१६; चसि. ९.३४ ) मूत्राघाताचा प्रकार.

**मूत्रोपघात**-पु., **मूत्रकृच्छ्रम्** ( सुउ. ५९.३ )
मूत्रकृच्छ्र, कष्टाने लघ्वी होणे.

**मूत्रौकसाद**-पु., **मूत्राघात० स द्विविधः पित्तजः कफजश्च** ( सुउ. ५८.२५; चसि. ९.२८ )
मूत्राघाताचा प्रकार. प्रकार २-पित्तज व कफज.

**मूत्रिका**-योग०, **रसक्रिया० लेपात् श्वित्रनाशिनी** ( असंचि. २२ )

या नावाचे सिद्धौषध. हत्ती, घोडा इ० च्या मूत्रात त्रिधारी निवडुंगाचे दूध, मोहरीचे तेल इ० मिश्रणाची रसक्रिया करुन तयार केलेला लेप. हा कोडनाशक आहे.

**मूर्च्छन**-न., **भ्रमः; मोहः** ( अहसू., १२.५२ ) **परस्परमेलनम्** ( असंसू. २१.३७ )
भ्रम, मोह, एकांत एक मिसळणे.
( परिव० ) **मार्गावरोधात्कोपनम्** ( चसि. ७.१५ )
मार्ग अडल्यामुळे प्रकुपित होणे.
**रोग०, मूर्च्छा** ( र. १२.१० )मूर्च्छा. बेसावधपणा.
**पारदसंस्कार० पारदोपरि उक्तौषधैर्नष्टपिष्टत्वकारकमर्थान्मर्दनपूर्वकपाचनरूपं कर्म, येन तस्य वङ्गनागादिकञ्चुकानां नाशो भवति** ( र ८.६४, र. ११.३२ )

पारदाच्या संस्काराचे नाव. सांगितलेल्या औषधात खल करून तो दिसेनासा होईपर्यंत खल करणे, व नंतर तो पारा डमरुयंत्राने वर उडवून घेणे, यामुळे त्याच्या कथील, शिसे यांच्या संबंधामुळे असलेल्या कंचुकादोषांचा नाश होतो.

**मूर्च्छा**–स्त्री., लक्षण० चेतनाच्युतिः ( सुनि. १.२३ ) रोग० ( चसू. २४.२७; सुउ. ४६.५०३ ) **क्षीणस्य हीनसत्त्वस्य तथाऽभिघातादिभिर्वोग्रा दोषाः बाह्येष्वाभ्यन्तरेषु च करणायतनेषु निविशन्ते, तदा मानवा मूर्च्छन्ति। अनिलादिभिः संज्ञावहासु नाडीषु पिहितासु तमः सहसाऽभ्युपैति तेन च सुखदुःखव्यपोहो भवति, सुखदुःखव्यपोहात् नरः काष्ठवत्पतति, स मोह एव मूर्च्छेत्युच्यते। सा षड्विधा–वातादिभिर्दोषैः शोणितेन मद्येन विषेण चेति। षट्स्वप्येतासु मूर्च्छासु पित्तं प्रभुत्वेन वर्तते। मूर्च्छायाः पूर्वरूपाणि–हृत्पीडा, जृम्भणं, ग्लानिः संज्ञादौर्बल्यं चेति। वातजमूर्च्छालक्षणानि–नीलं कृष्णमरुणं वा आकाशं पश्यंस्तमः प्रविशति शीघ्रं च प्रतिबुद्ध्यते, वेपथुः अङ्गमर्दो हृदयस्य प्रपीडा, कार्श्यं श्यावाऽरुणाच्छाया चेति वातजानि। पित्तजमूर्च्छालक्षणानि–रक्तं हरितवर्णं वा पीतमथाऽपि वा वियत्पश्यंस्तमः प्रविशति सस्वेदश्च प्रतिबुध्यते, पिपासा संतापो रक्तपीताकुलेक्षणत्वं संभिन्नवर्चस्त्वं पीताभा च इति पित्तजानि- कफजमूर्च्छालक्षणानि–मेघसंकाशं तमोघनैर्वाऽऽवृतमाकाशं पश्यंस्तमः प्रविशति, चिराच्च प्रतिबुद्ध्यते, आर्द्रेण चर्मणा प्रावृतैरिव गुरुभिरङ्गैरुपलक्षितः सन् सप्रसेकः सहृल्लासश्च भवतीति कफजानि लक्षणानि ज्ञेयानि। सर्वाकृतिः संनिपातात्। अपस्मार इवागता सा मूर्च्छा बीभत्सचेष्टितैर्विना जन्तुमाशु पातयति। रक्तजमूर्च्छा–पृथिव्यापस्तमोरूपं रक्तगन्धस्तदन्वयस्तस्मात् मानवा भुवि रक्तस्य गन्धेन मूर्च्छन्ति रक्तं दृष्ट्वा यदभिमुह्यति स द्रव्यस्वभाव अर्थात् रक्तस्य स्वभाव इत्येके वदन्ति। रक्तजमूर्च्छायां स्तब्धाङ्गदृष्टिर्गूढोच्छ्वासश्च मूर्च्छितः अस्ति। मद्यजमूर्च्छायां मद्येन विलपन् शेते, नष्टमानसः विभ्रान्तमानसश्च भवति; गात्राणि विक्षिपन् भूमौ पतति यावत् तन्मद्यं जरां नाम जरणं परिणामं वा न गच्छति । विषजमूर्च्छालक्षणानि–वेपथुः स्वप्नस्तृष्णा स्तम्भस्तीव्रज्वरश्चेति। मूर्च्छा पित्ततमप्रायोऽस्ति। देहिनां मूर्च्छा कृतवेगेषु दोषैः स्वयमेवोपशाम्यति** ( मा. ) **संक्षेपतश्चिकित्सा–सेकावगाहौ शीतप्रदेहाः व्यजनानिला गन्धवन्ति शीतानि पानानि हारा मणयश्चेति** ( सुउ. ४६.१४ ) **प्रसक्तमूर्च्छामभीक्ष्णं शिरोविरेकैस्तीक्ष्णवमनैश्च जयेत्। पथ्यं मधुरवर्गसिद्धं पयः, रक्तशालिः यवाः दाडिमं चेति** ( सुउ. ४६.१६;१८ )

मूर्च्छा. एकाएकी हालचाल बंद पडणे. हा रोग दुर्बल शरीर झालेल्यांना व दुबळ्या मनाच्या लोकांना होतो. किंवा तीव्र स्वरूपाचा मार लागल्यामुळे शरीर आणि मन कणखर असणाऱ्यांना सुद्धा होतो. ज्यावेळी शरिरातील संज्ञावाहणाऱ्या ज्ञानवाहिन्यांवर आकस्मिक असा आघात होतो; आणि वातादि दोषांनी त्या आच्छादित होतात, त्यामुळे सुखदुःखाचे ज्ञान नाहीसे होऊन बेशुद्ध अवस्थेत माणूस लाकडासारखा पडतो. त्यास मोह किंवा मूर्च्छा म्हणतात. मूर्च्छा सहा प्रकारची आहे. वात, पित्त, कफ, रक्त, मद्य आणि विष. या सहाही प्रकारांमधे पित्त हे प्रमुख आहे.

**मूर्च्छेची पूर्वरूपे**–हृदयात पीडा, जांभया, ग्लानि.

**वातजमूर्च्छा लक्षणे**–आकाश निळे, काळे किंवा तांबूस दिसू लागते व डोळ्यांपुढे अंधेरी येऊन बेशुद्धि येते. पण लौकरच सावध होतो. कंप, अंग दुखणे, हृदयपीडा, शरिराला कृशता, वर्ण काळसर तांबूस होतो.

**पित्तजमूर्च्छालक्षणे**– आकाश लाल, हिरवे, किंवा पिवळे दिसू लागते व अंधेरी येऊन बेशुद्धि येते. शुद्धिवर येतांना घाम येतो. तहान संताप, दृष्टीमध्ये तांबडी-पिवळट व क्षीणतेची झाक दिसते, मलप्रवृत्ति पातळ होते.

**कफजमूर्च्छालक्षणे**– आकाश काळ्या कुट्ट ढगांनी व्याप्त, अंधारून आल्यासारखे पाहतो व अंधेरी येऊन बेशुद्धि येते. शुद्धि उशीरा येते. सगळे अंग अगदी जड व ओल्या चामड्यानी वेढल्यासारखे दिसते. तोंडास पाणी सुटणे, उम्हासे येणे ही लक्षणे होतात.

**संनिपातज मूर्च्छा**– वर सांगितलेली तिन्ही दोषांची चिन्हे होतात. अपस्माराप्रमाणेच मूर्च्छेचा झटका इतर कोणतीही वेडीवाकडी हालचाल न होता मनुष्याला एकदम बेशुद्ध करतो.

**रक्तजमूर्च्छालक्षणे**– पृथ्वी आणि आप ही

तम स्वरूप असून रक्ताचा गंध हा त्यांनाच अनुसरून असतो. म्हणून रक्ताच्या वासाने मनुष्याला मूर्च्छा येते. रक्त ह्या द्रव्याचाच तो स्वभावधर्म आहे असे एक मत आहे. ह्या मूर्च्छेमध्ये दृष्टि ताठलेली होते. श्वास खोल जातो.

**मद्यजमूर्च्छालक्षणे**– मद्य प्यालेला मनुष्य विलाप करतो, झोपतो, मनावर ताबा नसतो, हव्या त्या गोष्टीकडे मन भटकते, हात पायादि अवयवही इस्ततत: आपटतो व जमिनीवर पडतो. ही स्थिती मद्य संपूर्ण जिरेपर्यंत टिकते.

**विषजमूर्च्छालक्षण**– कंप, झोप, तहान, आंग ताठणे, तीव्र ज्वर, मूर्च्छा ही पित्ताधिक्याने येते. दोषांचा वेग शांत झाला की ती आपोआप निघते. बेशुद्धावस्थेत असताना पाणी शिंपडावे, थंडपाण्याचा अवगाह करावा, थंडगार लेप कपाळावर लावावे, सुगंधि पंख्याने वारा घालावा, थंड पेये प्यावयास द्यावी, गळ्यात सुगंधि फुलांचे हार घालावे, मोती-पोवळी वगैरेच्या माळाहि गळ्यात घालाव्या. बेशुद्धि गेल्यावर म्हणजे मूर्च्छेचा वेग गेल्यावर मध्ये मध्ये नाकात विरेचन करणारे नस्य घालून नाकावाटे दोषाचा स्राव जाईल अशी चिकित्सा करावी. तीक्ष्ण पदार्थांनी ओकारी करवून आमाशयातील दोष काढावे मधुरवर्गात सिद्ध केलेली पेज पथ्यावर राहून प्यावयास द्यावी; लाल साळीचा भात, यव, दाडिम वगैरे आहारात उपयोजावी.

**–प्रतिषेध**–पु., **अध्यायसंज्ञा॰** ( सुउ. ४६.१ )
या नावाचा अध्याय. यात मूर्च्छेचे उपचार आहेत.

**मूर्च्छाय**–पु., **रोग॰ मूर्च्छा** (अहृसू. ५.४०) मूर्च्छा रोग.

**मूर्च्छित**–वि., **अतिशयप्रकुपितम्** (सुउ. ३.३) **आलोडितम्** ( चसि. ७.१८ ) **परस्परमिलितं मिश्रितं वा** ( सुशा. ७.१७ ) **अन्योन्यप्रसरेण एकत्वं प्राप्तम्** ( असंनि. ३.३ ) **वृद्धम्** ( सुनि. १६.४७ ) अतिशय प्रकुपित परस्पर मिसळलेला. परस्परात मिसळल्याने एकत्व प्राप्त झालेला. वाढलेला.
**मूर्च्छारोगयुक्तः** ( अमर. २.६,६१ )
मूर्च्छा रोगाने पीडित.
**स्वीयचापलपरित्यागपूर्वकं कज्जलाभस्वरूपापन्नः ( पारदः )** ( र. १.३४ )
मूर्च्छित पारा. स्वतःचे चांचल्य टाकून कज्जलीच्या स्वरूपाचा झालेला ( पारा ).

( **मूर्च्छिता** )–वि., **संयुक्ता** (सुसू. ४४.७१)
संयुक्त— एकरूप झालेली.

**मूर्त**–वि., **कठिनं, परिच्छिन्नपरिमाणयुक्तम्** ( सुशा. १.१९) व्यक्त, स्पष्ट दिसणारा, घट्ट, कठिण, मर्यादित, परिमाण युक्त, मर्यादित लांबी–रुंदी–जाडीचे.
**घनमद्रवम्** ( चवि. २.७ ) घन; द्रवहीन.

**मूर्ति**–स्त्री., **आकृतिः** ( सुसू. ३४.१० ) **व्यक्तिः** ( चसू. २६.३९ ) **काठिन्यम्** ( चशा. ४.१२ )
आकृति, व्यक्ति, काठिन्य.

**–बन्ध**–पु., **पारदबन्ध॰, अभ्रकजारणाद्विना सोमवल्ल्यादिदिव्यौषधीभिरेव कृतोऽग्निसहः पारदः** ( र. ११.८६ )
पारदाच्या बंधांपैकी एक. अभ्रक जारणावाचून सोमवल्ली इत्यादी दिव्यौषधींनीच अग्नि सहन करणारा पारा.

**–मत्**–वि., **मूर्तत्वयुक्तम् सुव्यक्तम्** ( चशा. ५.३ )
मूर्तत्व असलेला; चांगलाच व्यक्त, स्पष्ट दिसणारा.

**मूर्धन्**–पु., **शिरसः उपरितनो भागः । शिरः** ( असंशा. १०.१२ ) **दशप्राणायतनेष्वेकम्** ( चशा. ७.९ )
डोके; डोक्याचा सर्वांत वरचा भाग. प्राणाच्या दहा स्थानांपैकी एक.

( **मूर्ध** )–**गुण्डन**–न., **वस्त्रादिना शिरसः प्रच्छादनम्** (असंनि.५) वस्त्राने डोक्याला गुंडाळणे. फेटा बांधणे.

**–गौरव**–न., **मूर्ध्नि जडता, शिरोगौरवम्, शिरोजाड्यम्** (अहृसू. ४.१२) डोके जड होणे. डोक्याचा जडपणा.

**–तर्पण**–न., **मूर्धतैलम्** ( अहृसू. ७.६६ )
डोक्यावर तेल घालणे.

**–तैल**–न., **मूर्ध्नि तैलस्य विमर्दनम्** ( अहृसू. ३.१० ) **चतुर्विधं मूर्धतैलम्-अभ्यङ्ग-सेक-पिचवो बस्तिश्चेति । यथोत्तरं ते बलिनः** ( असंसू. ३१.१६ )
**मूर्धतैलगुणाः—कचानां सदनं, सितत्वं, पिञ्जरत्वं, परिस्फुटनं च नाशयति । शिरसः वातरोगाञ्जयति, इन्द्रियप्रसादं, स्वरबलं, हनुबलं, मूर्धाबलं च जनयति** ( असंसू. ३१.२०; अहृसू. २२.३४ )
डोक्याला तेल चोपडणे. चार प्रकाराने हे तेल लावता येते. ( अभ्यंग, सेक, पिचु आणि बस्ति ) ते प्रकार उत्तरोत्तर बलवान आहेत. **गुण**—केस गळणे. पांढरेपणा, पिंगटपणा, त्वचेला चिरण्या पडणे हे सर्व नष्ट होते. डोक्याचे वातरोग नाहीसे होतात.

हनुवटी डोके व स्वर बलवान होतात व इंद्रिये प्रसन्न होतात.

**–तैलनिषेवण**–न., **मूर्धतैलसेवनं, तच्च निद्रानाशे हितम्** ( सुशा. ४.४३ )
डोक्याला तेल लावणे. झोप येत नसेल अशांना हितकर.

**–तैलिक**–वि., **मूर्धतैलसंबन्धि** ( सुउ. १८.४९ )
डोक्याला तेल लावण्याच्या संबंधि.

**–रुज्**–स्त्री., **शिरोवेदना** ( असंसू. ५.३३ )
डोक्याची वेदना.

**–रोग**–पु., **शिरोरोगः** ( अहृसू. १२.४९; चसि.२.२२ ) डोक्याचा रोग.

**–विरेचन**–न., **चिकित्सा॰ शिरोविरेचनम्; नस्यम्** ( चचि.३.१७३ ) नस्य, डोक्याचे रेचक.

**–विरेचनगण**–पु., **शिरोविरेचनगणः, वेल्लन्तरादिगणः** ( अहृसू. १५.४; अहृसू. २१.१८ )
डोक्याचा रेचक औषधिवर्ग. वावडिंग इत्यादी.

**मूर्धाभिघातिन्**–वि., **मूर्धगतरोगी, विकृतमस्तिष्कः** ( सुशा. १०.९ )
डोक्यात बिघाड झालेला, डोक्याच्या रोगाचा, डोक्यावर आघात झालेला.

**मूर्धरेचन**–पु., **नस्यभेदः, शिरोविरेचनम्** (अहृसू. २०.७); नाकात घालावयाचे डोक्याचे रेचन.

**मूर्धावरण**–न., **लिङ्गमणेरावरणं यथा दाक्षिणात्याः कृत्रिममणिं कारयन्तीति जेज्जटः पाठः** ( सुचि. २४.१२० )
शिश्नाच्या मण्यावरील कातडी. दक्षिणेतील लोक शिश्नाच्या मण्याच्या आकाराचे कृत्रिम आवरण संभोगाच्या वेळी करतात.

**मूर्धास्थिरुज्**–स्त्री., **शिरोऽस्थिवेदना, सान्निपातिकज्वरलक्षण॰** ( सुउ. ३९.३६ )
डोक्याच्या हाडात दुखावा असणे. त्रिदोषज ज्वरलक्षण.

**मूर्वा**–स्त्री., **वनस्पति॰, चोरस्नायुः, धनुर्गुणोपयोग्या, 'दूधउड' इति लोके** (सुसू. ३८.६) **आरग्वधादिगणे उल्लिखिता; यया पूर्वदेशे गुणान्कुर्वन्ति धनुषाम्। मूर्वातान्तैर्व्रणं सीव्येत्** ( सुसू. २५.२१ ) **मूर्वादिसिद्धं सर्पिः अग्निदग्धव्रणानां रोपणम्** ( सुसू. १२.२७-२८ ) **महाकषायवर्गे तृप्तिघ्नगणे स्तन्यशोधनगणे चैकं द्रव्यम्** ( चसू. ४.११-१२ ) **हस्तिमेहे उपयुज्यमानतिन्दुकादिकषाये द्रव्यमेकम्** ( सुचि. ११.९ ) **मूत्रदोषनिवारकं द्रव्यम्** ( सुउ. ५८.३६ ) **अनुवासनकर्मणि उपयुक्तं द्रव्यम्** ( सुचि. ५.१२ ) **पटोलादिगणे द्रव्यमेकम्** ( सुसू. ३८.३३ ) **तीक्ष्णचाकचक्यविशिष्टत्रिदलपत्रा वल्ली. 'चुरनहार,' 'मोरवेल' इति लोके प्रसिद्धा। कुष्ठामयघ्नगणे द्रव्यमेकम्** ( र. २०.३३ ) **गुणाः–स्वादुरसोष्णा, हृद्रोगकफवातजित्कुष्ठकण्डूवमीमेहविषमज्वरनाशिनी** ( ध. १.१३; घृ. ९ ) **तिक्ता कषायोष्णा** ( रा. ३.१२; घृ. ९ )

हिं.—मूर्वा मुर्हरी चुरनहार चूर्णहार.
**म.—मोरवेल.**
गु.—मुरवेल.
बं.—मुर्वा मुर्गा मुरहा शोचमुखी वोडाचक्र.
त.—मरुलकलङ्ग.

मोरवेल— तीक्ष्ण, चकचकीत, त्रिदळ पानांची वेल. मूर्वेच्या धाग्यांनी धनुष्याची दोरी करतात. व्रण शिवतात. बहावा इ॰ तृप्तिघ्न. स्तन्यशोधन आणि पडवळ इ॰ कुष्ठघ्न गणातले एक द्रव्य. जळालेल्या फोडांचे रोपक. हत्तीमेहामध्ये टेंभुरणी इत्यादी द्रव्यांच्या काढ्यातील एक द्रव्य. मूत्रदोषनाशक. स्नेह बस्तीत उपयुक्त. **गुण**—गोड, कडू, तुरट, उष्ण, हृद्रोग, कुष्ठ, कंडू, ओकारी, प्रमेह, थंडी ताप नाशक. रुचीला तीक्ष्ण.

**–पत्र**–न., **मूर्वालतायाः पत्रं, कफजव्रणे उपयुक्तम्** ( सुचि. १.११५ )
मोरवेलीचे पान. कफज व्रणावर उपयुक्त.

**मूल**–न., **प्रधानकारणम् "दोषधातुमलमूलं हि शरीरम्"** ( सुसू. १५.३ ) **कारणम्** ( अहृसू. ११.१ चचि. ३०.५; चसि. ९.३ )
मुख्य कारण. जसे शरिराचे मूळ कारण दोष धातु मल हे होत.
**संभवहेतुः** ( सुसू. १.२८ ) उत्पत्तीचे कारण.
**प्रभवस्थानं, प्रारम्भस्थानं वा, यथा प्राणवहानां स्रोतसां हृदयं मूलं महास्रोतश्च** ( सुशा. ९.१२; चवि. ५.८; सुसू. १.१० )
सुरुवातीचे ठिकाण, जसे प्राणवह स्रोतसाचे हृदय व महास्रोतस मूळ होत.

**वनस्पत्यंग०** शिफा **''मूलत्वक्सारनिर्यासनालस्वरस-पल्लवाः क्षारः क्षीरं फलं पुष्पं भस्म तैलानि कण्टकाश्च** ( चसू. १.७३ )
नार डिंक किंवा चीक, पारंबी, मूळ, साल, नाल, स्वरस, पाने, क्षार, दूध, फळ, फूल, भस्म, तेल, काटे ही सर्व वनस्पतीची अंगे होत.

**वनस्पति० मूलकम्** ( र. ११.२६ ) मुळा.

**गर्जरम्** ( ध. ४.६९ ) गाजर.

**पिप्पलीमूलम्** ( ध. २.७५ पृ. ८४. ) पिंपळमूळ.

**पुष्करमूलम्** ( ध. १.६६ ) पुष्करमूळ.

**ग्रहणस्थानं, यथा शलाकामूलम्** ( अहसू. २५.३७ ) मध्यापासून वर दंडासारखी व मुळाशी अर्धचंद्राकार असलेली सळई.

**धूमनेत्रस्य वर्तिसंवरणस्थानं धूमनेत्रमूलमिति** ( सुचि. ४०.५ )
चिलमीच्या ज्या भागात धूमपानासाठी केलेली औषधी वात ठेवायची असते ते स्थान.

**रोग० गुदार्शः** ( र. २२.२७; २.१३२; २०.११८) गुदामधील मूळव्याध.

**( मूली )**–स्त्री., मूलकम् ( र. २४.५१ ) मुळा.

**–कुठारक**–पु., योग०, **वरनागोऽभ्रकसत्त्वं ताम्रं तीक्ष्णलोहं सर्वं समभागं त्रिगुणेन हरितालेन मेलयित्वा पारदेन सह संमर्द्य पिष्टिं कुर्यात्। तां पिष्टीं भल्लातकवृक्षमूले खातं कृत्वा स्थापयेन्मास-पर्यन्तम्। ततस्तां गोदुग्धे ततश्च भल्लातकतैले लौहभाण्डे च स्थापयेत्। तैलमेतत्प्रस्थमात्रं भवेत्। तस्मिंस्तां पिष्टिं पचेत्। तत्तैलेन च गन्धकं मर्द-यित्वा तेन सह भस्मक्रियां कुर्यात्। ततश्च कार्तिक-मासोत्थकुरण्टकपत्रजेन रसेन सह पारदं मर्दयित्वा भस्मतां नयेत्तच्च भस्म समभागिकेन पूर्वरसेन सह मेलयेत्। ततश्च वन्यसूरणनिर्गुण्डीमहाराष्ट्रीगज-कर्णिकावज्रवल्लीचित्रकाणां रसेन मर्दयित्वा शोषयेत्। पुनश्च त्रिवारं भृङ्गराजरसेन मर्दयेत् अयं वल्लमात्रोप-सेवितोऽनुपानत्वेन ससर्पिष्कयवानीचित्रक-विडङ्गत्रिफला-पूर्णसहितः अर्शांसि मुखनासिका-ऽऽमयान् प्लीहग्रहणीगुल्मयकृदग्निमान्द्यकुष्ठानि च नाशयेत्** ( र. १५.३४-४२ )
या नावाचे एक सिद्ध औषध. वरनाग ( शिसे व पोलाद यांच्या संयोगाने निर्माण झालेले द्रव्य ) अभ्रकसत्व, तांबे, पोलाद सर्व समभाग, तिप्पट हरताळ. पारा व हरताळ प्रथम खल करून त्यात वरील भस्मे घालून ती पिष्टि बिब्याच्या झाडाच्या मुळात खाच करून त्यात भरून एक महिना ठेवावी नंतर गाईच्या दुधात व बिब्ब्याच्या तेलात खलून लोखंडी भांड्यात ठेवावी. नंतर ६४ तोळे भिलाव्याच्या तेलात कढवावे. त्या तेलाने गंधक खलून ते घालून भस्म करावे. कर्तिक महिन्यात कोऱ्हांटीच्या पानांच्या रसात पारा खलून त्याचे भस्म करावे. ते समभाग भस्म पूर्वीच्या औषधात खलावे. नंतर रानसुरण, निर्गुंडी मराठी एरंड वज्रबल्ली ( अस्थि संहारलता ) चित्रक यांच्या रसात खलून सुकवावे. माक्याच्या रसात पुनः तीन वेळ खलावे. प्रमाण–एक वाल. ओवा, चित्रक, वावडिंग त्रिफळा सहित तुपाबरोबर घ्यावे. मुखरोग, प्लीहा, ग्रहणी, गुल्म, यकृत अग्निमांद्य व कुष्ठ नाशक.

**–ग्रन्थि**–स्त्री., **दूर्वा०, मालादूर्वा** ( रा. ८.२३२; पृ. १६३ ) दूर्वांचा एक प्रकार.

**–ज**–न., **आर्द्रकम्** ( ध. २.८४; पृ. ८७ ) आले.

**–पुष्कर**–न., **पुष्करमूलम्** ( रा. ६.९३; पृ. १९ ) पुष्करमूळ.

**–पोती**–स्त्री., वनस्पति०, **गुणाः—त्रिदोषघ्नी, वास्तु-कभेदः वृष्या, बल्या, लघ्वी, बलपुष्टिकरी, रुच्या, जठरानलदीपनी च** ( रापरि. ७.७८,७९-३५३ ) एक प्रकारचा चुका, चंदनबटवा. गुण– त्रिदोषघ्न शुक्राला हितकर, बलकर, हलकी, बलपुष्टिकर, रुचकर अग्निदीपक.

**–फलद**–पु., **पनसः** ( रापरि. ११.९-३७३ ) फणस.

**–विरेचन**–न., **विरेचनकरं मूलं, यथा त्रिवृन्मूलम्** ( सुसू. ४४.३ ) रेचक मूळ. निशोत्तर मूळ.

**–विष**–न., **स्थावरवृक्षलतादिमूलानां विषम्** ( चचि. २३.१२३; १३.१३२ ) **अष्टौ मूलविषाणि–क्लीत-काश्वमारगुञ्जासुगन्धगर्गरककरघाट विद्युच्छिखाविज-याधीत्यष्टौ मूलविषाणि तस्य लक्षणं-मूलविषैरुद्वेष्टनं प्रलापो मोहश्च भवेत्** (सुक. २.७) **विषचिकित्सायाः-मस्य प्रमाणं–चतुर्भिर्यवैर्हीना मात्रा। षड्भिर्यवै-र्मध्यमा मात्रा। अष्टाभिर्यवैरुत्तमा मात्रा। मूलविषस्य यथायथं यथाविधि मात्रा प्रयोज्या। तत्र कीटदष्टस्य द्वौ यवौ। वृश्चिकदष्टस्य तिलमात्रम्। असृक्स्थे विषे नैव प्रयुञ्जीत। लूतादष्टस्य पाने विषं नेष्यते। किंतु लेपादिकर्मणि प्रशस्तम्। दष्टानां पानलेपयोर्मूलविषं प्रशस्तम्** ( असंउ. ४८.३७५ )

वृक्ष, वेली यांची विषारी मूळ विषे. विषारी मुळे आठ प्रकारची आहेत. ( १ ) क्लीतक ( २ ) कण्हेर ( ३ ) गुंजा ( ४ ) सुंगध ( ५ ) गर्गरक ( ६ )करघाट ( ७ ) विद्युत् शिखा ( ८ ) विजया. या विषामुळे आंगात पेटके येतात. माणूस असंबद्ध बडबडतो, आणि बेशुद्धि येते.

जंगम विषावर औषध म्हणून स्थावर विषाचा उपयोग करावा. चार यव हे कमी प्रमाण, सहा यव मध्यम व आठ जव उत्तम प्रमाण. किडा चावल्यास दोन जव, विंचू चावल्यास तिळाएवढे, रक्तगत विषावर हे देऊ नये. लूत चावली तर पोटात देऊ नये. पण लेप इत्यादींमध्ये द्यावे. **दंश** झालेल्यांना पान लेपात मूलविष योग्य.

**–शाक**–न., **शाकभेदः यथा नवनीतेन मूलशाकं विरुध्यते** ( असंसू. ९.९ )

सुरण वगैरे सारख्या कंदमुळांच्या भाज्या लोण्याबरोबर खाऊ नयेत.

**–सन्नियम**–पु.. **मूलसंख्याविनिश्चयः; मूलस्थानविनिश्चयः** ( सुशा. ९.३ )

मूळसंख्या निश्चित करणे. किंवा मूलस्थान निश्चित करणे.

**–सिरा**–स्त्री., **शारीर० प्रधानसिरा, मूलस्थानाश्रिता सिरा, एताः संख्यातः चत्वारिंशत्** ( सुशा. ७.६ )

मुख्य शिरा. मुख्य स्थानाच्या आश्रयाने असणाऱ्या शिरा, ह्या चाळीस आहेत.

**–हेतु**–पु., **प्रकृतिहेतुः. यथा शोफस्य मारुतः दाहस्य पित्तं, शैत्यस्य कफः** ( काखिल. १७.२४ )

मुख्य–हेतु मुख्य कारण. जसे सुजेला कारण वायु मुख्य, दाहाला कारण पित्त, थंडीला कफ.

**मूलक**–न., **पिप्पलीमूलम्** ( सुउ. ४२.७२ ) पिंपळमूळ. **गर्जरम्** (ध. ४.६९; पृ. १४७) गाजर.

**वनस्पति०, स्वनामख्यातमूलशाक०, ग्रन्थिविसर्पे शुष्कमूलककल्को लेपार्थमुपयुज्यते** ( असंचि. २० ) **नाडीस्वेदार्थमुपयुक्तं द्रव्यम्** ( चसू. १४.३१ ) **गुणाः–बालमूलकमव्यक्तरसं, किंचित्क्षारं, सतिक्तकं, दोषहरं, लघूष्णं, गुल्मकासक्षयश्वासव्रणनेत्रगलामयान् स्वराग्निसादोदावर्तपीनसांश्च नियच्छति। यत् महत् तद्रसे पाके च कटुकमुष्णवीर्यं त्रिदोषकृत् गुर्वभिष्यन्दि च। तदेव स्निग्धस्विन्नं वातजिद्भवति । शुष्कमूलकं तु वातश्लेष्महरम्। महच्छुष्कमार्द्रं चानग्निपक्वं चेद्दोषलं भवति** (अहसू. ६.१०२-१०५; सुसू. ४६.२४१; चसू. २७.१६८; सुसू. ४०.५) **क्रुमिहरशाक०** ( चवि. ७.१७ ) **गुरु, विष्टम्भि, तीक्ष्णमामन्त्रिदोषनुत्, स्निग्धस्विन्नं तदेव कटूष्णं कफवातनुत्; शुष्कं तु त्रिदोषशमनं, विषदोषहरं, लघु च** (ध.४.३४; पृ. १४०) **दीपनं, हृद्रोगनाशनं, रुचिदं च** (रा.७.५२) **मूलकन्दजाः शिबाः रसे विपाके च मधुराः बलप्रदाः पित्तनिबर्हणाश्च** ( सुसू. ४६.४६-४७ )

हिं.—मूली, छोटी मूली, मुरई.

**म.—मुळा.**

गु.—मूला, नाहानी मुळी.

बं.—मूला, चणकमूली.

त.—मुलंगि.

फा.—तुख, तुर्ब.

मुळा. भाजी. सुकलेल्या मुळ्याच्या चटणीचा गाठी धावऱ्यावर (ग्रंथिविसर्प) लेप, नळीतून वाफेने शेकण्यास मुळा चांगला. **गुण—** कोवळा मुळा अस्पष्ट रसाचा, किंचित क्षारयुक्त, थोडा कडु, दोषहारक, रुचकर, हलका, उष्ण, हृद्रोग, गुल्म, खोकला, क्षय, श्वास, व्रण, डोळा, गळा, स्वर, यांचे रोग, अग्निमांद्य, उलटे पोट फुगणे, पडसे, कृमि, नाहीसे करतो. कडक मुळा ( मोठा, जून ) तिखट, पचल्यावरही तिखट, उष्ण, त्रिदोषकर, जड, व ओलावा वाढविणारा. तोच शिजवून फोडणी दिला की वातहारक. सुका मुळा वातकफहारक, हलका, त्रिदोष व बिषहर, मोठा सुकलेला, ओला, शिजवलेला, दोषवर्धक.

मुळ्याची शेंग, ( डिंगरी ) गोड, पचल्यावर गोड, बलकारक, पित्तनाशक.

**कन्दविषभेदः, विषलक्षणानि–वैवर्ण्यं, छर्दिः, हिक्का, शोफः, प्रमूढता च** ( सुक. २.५; असंउ. ४०; र. २९.१७ )

मूलविषाप्रमाणेच कंदही काही विषारी असतात. त्यांची विषलक्षणे– वर्ण बिघडणे, ओकारी, उचकी, सूज व मूर्च्छा.

( **मूलिका** )–स्त्री., **सर्पाक्ष्यादीनां मूलम्** ( र. ११.५१ ) सर्पाक्षी इत्यादींचे मूळ.

**–तैल**–न., **मूलकबीजानां तैलम् । गुणाः–तीक्ष्णं, कटु अस्रपित्तकृत् अर्शःकुष्ठकृमिश्लेष्मशुक्रमेदोऽनिलापहम्** ( असंसू. ६.१०६ ) **कटुतैले उल्लिखितं शिरोरोगापहरं च** ( सुसू. ४५.११५ )

मुळ्याच्या बियांचे तेल. **गुण**—तीक्ष्ण, तिखट, रक्तपित्तकर, मूळव्याध, कुष्ठ, कृमि, कफ, शुक्र, मेद, वात, व शिरोरोग नाशक.

**सिद्धतैल०, रास्नाशिरीषयष्टिमधुशुण्ठीसहचरामृतास्योनाकदेवदारुशम्पाकाश्वगन्धात्रिकण्टकानां दश पलान् भागान् कषायमुपकल्पयेत् । ततस्तेन कषायेण सर्वगन्धैश्च कार्षिकैः दध्यारनालमाषाम्बुमूलकेक्षुरसैः पृथक्प्रस्थोन्मितैः सार्धं तैलप्रस्थं विपाचयेत् एतन्मूलकतैलाख्यं वर्णायुर्बलवर्धनं तथा प्लीहमूत्रग्रहश्वासकासवातरोगनुत्** ( चचि. २८.१७२-१७५ )

एका सिद्धौषधाचे तेलाचे नाव. रास्ना, शिरीष, सुंठ, कोऱ्हांटी, गुळवेल, टेंटू, देवदार, बहावा, आसकंध, गोखरू, ही चाळीस तोळे घेऊन काढा करून तो काढा सर्व सुगंधी द्रव्ये एकेक तोळा दही, कांजी, उडदाची कांजी, मुळा, उसाचा रस, प्रत्येकी ६४ तोळे घेऊन तेल ६४ तोळे शिजवावे. हे मुळ्याचे तेल वर्ण, आयुष्य, बलवर्धक तसेच प्लीहा, मूत्राचा त्रास, श्वास, खोकला व वातरोग नाशक.

**-पर्णी**-स्त्री., गुग्गुलुः ( चचि. ३.२६७ ) गुग्गुळ. शिग्रुः ( ४.३९, पृ. १४२ ) शेवगा.

**-पोतिका**-स्त्री., शाक०, **बालमूलकम् । गुणाः– शाकवर्गे श्रेष्ठा, चक्षुष्या, कटुतिक्तरसा, हृद्या, रोचनी, वह्निदीपनी, सर्वदोषहरा, लघ्वी, कण्ठ्या च** (सुसू. ४६.२४०; सुउ. १७.५०)

कोवळा मुळा. गुण–भाज्यात श्रेष्ठ, डोळे, हृदय यांना हितकर रोचक, अग्निदीपक, हलका. सर्वदोषहारक तिखट व कडु.

**-फल**-न., **मूलकशिंबिः, मूलकफलानि उष्णानि, शोथपाचनानि च** ( सुसू. ३७.९ )

मुळ्याची शेंग, डिंगरी. उष्ण व सूज पिकवणारी.

**-यूष**-पु., **बालशुष्कमूलयूषः । अयमपि मुद्गादिसहितो ज्ञेयः । जेज्जटस्तु यद्यपि बालमूलकं त्रिदोषघ्नं तथापि तस्य न यूषकरणे श्रुतिरस्तीत्याह। गुणाः– श्वासकासप्रतिश्यायप्रसेकारोचकज्वरांस्तथा कफमेदोगलामयान्हन्ति** ( सुसू. ४६.३७२; काखिल. ४.४० )

वाळलेल्या कोंवळ्या मुळ्याचे कढण, मूग इत्यादींसह. जेज्जट म्हणतो जरी कोवळा मुळा त्रिदोषघ्न आहे तरी यूष करावा असे शास्त्रात सांगितलेले नाही

**गुण**— श्वास, खोकला, पडसे, तोंडाला पाणी सुटणे, अरुचि, कफमेदोरोग व घशाचे रोग नष्ट करतो.

**मूलाकरोद्भव**-वि., **मूलभूतं खनिसंभूतम् लवणभेदः, मूलभूतः आकरो मूलाकरः, प्रशस्ततरतुरङ्गमोत्पत्तिभूमिस्तत्रोद्भवं लवणम् । तल्लवणं कटुकं छेदि च** ( सुसू. ४६.३२१ )

आकार म्हणजे खाण. तिच्यात होणारे मीठ. ते तिखट व दोषछेदनकर. ज्या भूमीत उत्कृष्ट प्रतीचे घोडे निपजतात त्या भूमीत उत्पन्न झालेले ( मीठ ).

**मूलामय**-पु., गुदार्शः ( र. ५.७२ ) गुदातील मूळव्याध.

**मूलारिष्ट**-वि., **अरिष्ट०** ( असंचि. १४ )

मुळांचे केलेले अरिष्ट, दशमूलारिष्ट.

**मूलार्ति**-स्त्री., **गुदपीडा, गुदार्शः** ( र. २.११० )

मूळव्याध.

**मूलासव**-पु., **आसुत० ग्रहण्यां शस्तस्तथैव दीपनो रक्तपित्तजित् अनाहकफहृद्रोगपाण्डुरोगाङ्गसादनुच्च** ( चचि. १५.१५६-५९ )

मूळाचे आसव. ग्रहणीमध्ये चांगले. तसेच दीपक, रक्तपित्त जिंकणारे, पोटफुगी, कफजहृद्रोग, पांडुरोग अंग गळणे हे विकार नष्ट करणारे.

**मूलाह्व**-न., **मूलकम्** ( रा. ७.५०; पृ० १४० ) मुळा.

**मूलिनी**-वि., **मूलं प्रशस्ततमं यस्याः सा । षोडशैकोना मूलिन्यः** ( चसू. १.७४ )

मूळ खूप मोठे ( प्रशस्त ) असलेली वनस्पती. अशा १५ आहेत.

**मूषक**-पु., **प्राणि० द्र० ' मूषिक '** ( चवि. ३.७ ( ३ ) ध. ५.१३२; पृ. १९६; ध. ६.४३३; पृ. २७४ ) उंदीर.

**वनस्पति० मुष्कक** (ध. ५.१३२; पृ. १९६) मोखा.

**सोमलः, गौरीपाषाणः** ( र. ३.१३९ ) सोमल.

**-कर्णी**-स्त्री., **वनस्पति०** ( चसू. ४.११ ) **मूषककर्णी गुणाः–कटुः उष्णा पाचनी कफपित्तहरा आनाहज्वरशूलार्तिनाशिनी** ( रापरि. ३.२३ ) **एतत्कोमलपल्लवाः रोगे उपयुज्यन्ते** ( असंचि. २२ )

हिं.—मूषाकानी.

**म.—उंदीरकानी.**

गु.—उंदरकनी.

बं.—इंदूरकानी.

त.—चवरियारकुन्तल.
फा.—गोरोमुष, सतर.
**गुण**— तिखट, उष्ण, पाचक, कफपित्तहारक, पोटफुगी, ज्वर, शूलवेदना. ही कोंवळ्या पानांची असताना रोगात उपयुक्त होते.

**–मारी**–स्त्री., **सुतश्रेणी** ( रापरि. ४.१६; पृ. ३३६ ) उंदीरकानी.

**मूषा**–स्त्री., **मृत्तिकालोहनिर्मितः पात्रविशेषो योऽग्नितापनयोगाद्धातूनां दोषमोक्षणेन नाम निरसनेन सत्वनिपाताय साहाय्यो भवति** ( र. १०.१; ( सुउ. १८.८६ )
माती व लोह कीट यापासून केलेले भांडे. ( मूस ). यात ठेवून अग्नीत तापवलेले धातु निर्दोष होऊन त्यांचे सत्वपातन सुलभ होते.

**मूषाप्यायन**–न., **मूषाक्षिप्तस्य द्रावणयोग्यद्रव्यस्य द्रुतिसमये मूषायाः अग्नितः क्षणमात्रमुद्धरणम्** ( र. १०.३२ )
द्रावणासाठी मुशीत घातलेले द्रव्य अग्नीवर ठेवून पातळ होत असता ती मूस क्षणभर अग्नीतून उचलून धरणे ह्या क्रियेस मूषाप्यायन म्हणतात.

**मूषिक**–पु., प्राणी०, मूषकः, आखुः, प्रसहवर्गे, प्रोक्तः ( चसू. २७.३५ ) **भूमिमूषिकः बिलेशयवर्गे कीर्तितः** ( सुसू. ४६.७८ ) **अयं जङ्गम–सविषप्राणिविशेषः, सुश्रुते अष्टादशप्रकारकाः–लालनः, पुत्रकः, कृष्णः, हंसिरः, चिक्वि(की)रः, छुछुन्दरः, अलसः कषायदशनः, कुलिङ्गः, आजितः चपलः, कपिलः, कोकिलः, अरुणसंज्ञः, महाकृष्णः, महाश्वेतः, कपिलाखुः, कपोनाभश्च इत्यष्टादश** ( सुक. ७.३-६ ) **अष्टाङ्गसङ्ग्रहे–लालनः, चपलः, पुत्रः, हसिरः, चिक्किरः, अजिरः कषायदन्तः, कुलकः, कोकिलः, कपिलः, असितः, अरुणः, शबलः, श्वेतः, कपोतः, पलितोन्दुरः (रुः), छुछुन्दरः रसालः (रसालाख्यः), इत्यष्टादशभेदाः** ( असंउ. ४६ ) **मूषिकाः पञ्चधा विषं क्षिपन्ति, शुक्रेण, पुरीषेण, मूत्रेण, नखैर्दंष्ट्राभिश्च । तथा च गर्भिण्या मूषिकया दष्टेऽम्लादिदोहदः, ऋतुमत्या दष्टे रक्तमेहनमाध्मानं रतिशीलता च** ( सुक. ७.७ ड. ) **मूषिकाण्डं वृष्यघृतसिध्यर्थमुपयुज्यते** ( सुचि. २६.३१ )
मूषिकविषेऽगदः—**कुष्ठं, त्रिकटुकं, दार्वी, मधुकं, लवणद्वयं, मालती, नागपुष्पं च एतानि कपित्थरसपिष्टानि शर्कराक्षौद्रसंयुतानि अद्यात् । अयं सार्वकामिकनामाऽगदः** ( सुक. ५.८२-८३ ) **वृक्षमूषिकोऽपि मूषिकसंज्ञयोल्लिखितः, स च पर्णमृगेष्वेकः** ( सुसू. ४६.७६ )
उंदीर. ह्या प्राण्याचे १८ प्रकार आहेत. सुश्रुतोक्त व संग्रहोक्त नावे वर आहेत. हा प्राणी विषारी आहे. हा पाच प्रकारांनी आपले विष टाकतो. शुक्राबरोबर विष्ठेबरोबर, मूत्राबरोबर, नखांबरोबर आणि दातदाढांबरोबर. गर्भिणी उंदरी चावली तर आंबट इत्यादि घेण्याची इच्छा. ऋतुस्राव असलेली तर रक्ताची लघ्वी, पोटफुगी, संभोगाची प्रवृत्ति. उंदराच्या अंडाने तयार केलेले तूप शुक्रवर्धक असते. उंदराच्या विषावर-कुष्ठ, त्रिकटु, दारुहळद, ज्येष्ठमध, सैंधव, सौवर्चल ( संचळ ) चमेली, नागपुष्पे ही कवठाच्या रसात वाटून साखर मध घालून द्यावी. याला **सार्वकामिक अगद** म्हणतात. झाडावरच्या उंदरालाही उंदीरच म्हणतात. पाने खाणाऱ्यांपैकी एक.

**( मूषिका )**–स्त्री., **मूषा** ( र. १०.९ ) मूस.
**निर्विषाणां जलौकानामन्यतमा जलौका, मूषिकाकृतिवर्णाऽनिष्टगन्धा च** ( सुसू. १३.१२ )
मूशीचे आकाराची जळू. निर्विष जळवांच्या जातीपैकी एक. ही चिचुंद्रीच्या आकाराची व रंगाची असून हिचा वास अपायकारक असतो.
**सुतश्रेणी**, उंदीरकानी.

**( मूषिक )–कल्प**–पु., **अध्यायसंज्ञा०** ( सुक. ७.१ ) अध्यायाचे नाव.

**–दंश**–पु., **आगंतुरोग० मूषकस्य दंशः** (सुक. ७.३३) **द्र० 'मूषकविष'** उंदराचा दंश.

**–पर्णिका**–स्त्री., **वनस्पति० पुत्रश्रेणीति ख्याता, शोथे उन्मर्दनार्थमुपयुक्ता** ( चचि. १२.७२ )
उंदीरकानी. पुत्रश्रेणी हे दुसरे नाव, सुजेवर मर्दनाकरिता उपयुक्त.

**–पर्णी**–स्त्री., वनस्पति०, **दन्तीपर्यायः** ( चक. १२.३; सुउ ५४.२७ ) **मूषिककर्णाख्यं द्रव्यान्तरमिति केचित्** ( सुउ. ५४.२७ )
मूषकपर्णी हा दन्तीचाच भेद आहे. काहींच्या मते मूषिककर्ण नांवाचे एक निराळेच द्रव्य आहे.

**–विष**–न., **मूषकविषम् । मूषिकाणां विषमभ्रदर्शने प्रकुप्यति । किंवा मूषिकविषं यद्दोषाधिकं तत्तस्य वृद्धिहेतुषु कालेषु प्रकुप्यति । तत्र वमनविरेचन-**

शिरोविरेचननयनाञ्जनादिः दूषीविषापहश्च विधिः कार्यः। ( असंउ. ४६; सुक. ७.४१ ) मूषिकाणां शुक्रं यस्मिन्नङ्गे पतति वाते शुक्रदिग्धैरङ्गैर्यदङ्गं स्पृशंति तेन रक्तं दूषितं भूत्वा पाण्डुतामापद्यते। ततो ग्रन्थयः श्वयथुः कोठो मण्डलानि भ्रमोऽरुचिः शीतज्वरोऽतिरुक्तोदो वेपथुः पर्वभेदनं च रोमहर्षः स्रुतिर्मूर्च्छा तथा श्लेष्मानुबद्धबह्वाखुपोतकच्छर्दनं च सकृद्भवति । मूषिकविषप्रभावान्मूषिकबालाकार-मांसखण्डानां छर्दनं सकृद्भवतीति। मूषिकविषं व्यवायि कृच्छ्रं भूयोभूयः कुप्यमानं कालान्तर-प्रकोपि दीर्घकालानुबन्धि चास्ति। एतज्जुष्टस्य यदा मूर्च्छाऽङ्गशोफो वैवर्ण्यं क्लेदः शब्दाश्रुतिः ज्वरः शिरोगुरुत्वं लालासृक्छर्दिश्च भवति। तदा-ऽसाध्यमाखुविषम्। तथा च शूनबस्तिर्विवर्णौष्ठो मूषिकाभैः ग्रन्थिभिः व्याप्तः छुछुन्दरसगन्धो भवत्याखुदूषितः सोऽप्यसाध्यः ( असंउ. ४६ )

न., मूषकदंशलक्षणानि– ग्रन्थयः, शोफाः, मण्ड-लानि, पीडकोपचयश्चोग्रः विसर्पाः, किटिभानि च जायन्ते। तथैव पर्वभेदः तीव्रा रुजः, मूर्च्छाऽङ्ग-सादनं, ज्वरः, दौर्बल्यमरुचिः, श्वासो वमथुर्लोम-हर्षणं च ( सुक. ७.८-९ ) चिकित्सा च–अग्नितप्तेन घृतेन दहेत्। तथा च विस्रावयेत्, प्रलेपयेच्च शिरीषरजनीकुष्ठकुङ्कुमैरमृतायुतैः ( सुक. ७.३३ ) शुकाख्यकोषवत्याश्च मूलं मदनं देवदालीफलं च दध्ना पाययेत्। पीत्वा स रुग्णो विषं वमेत्। अनन्तरं फलं, वचा, देवदाली, कुष्ठं, गोमूत्रपेषितं दध्ना सह लेह्यम्। सर्वमूषिकदष्टानां एष सुखावहो योगः ( सुक. ७.३४-३६ )

उंदराचे विष. उंदरांचे विष ढग आले असता प्रकुपित होते. किंवा उंदराच्या विषात ज्या दोषाचे आधिक्य असेल, तो दोष वाढण्याच्या काळात ते प्रकुपित होते. त्या ठिकाणी वान्ती, विरेचन, नाकातून दिलेले डोक्याचे विरेचन, डोळ्यात अंजन घालणे इत्यादी दूषीविष नाहीसे करणारे उपचार करावे. उंदराचे शुक्र ज्या भागावर पडते किंवा उंदीर शुक्र लागलेल्या शरिराने ज्या भागाला स्पर्श करतील, त्या भागांतील रक्त त्यामुळे दुष्ट होऊन पांढुरके बनते. नंतर गाठी, सूज, पित्त उठणे, चकंदळे, चक्कर येणे, तोंडाची चव जाणे, थंडी वाजून ताप येणे, अतिशय वेदना होणे, टोचल्यासारखी वेदना होणे, थरकाप, सांधे फुटल्यासारखे वाटणे, रोमांच उभे राहाणे, रक्तस्राव होणे, मूर्च्छा, तसेच कफाने अनुबद्ध, उंदराच्या पिलासारख्या पदार्थांची वान्ती एकसारखी होते. उंदराच्या विषाच्या प्रभावामुळे उंदराच्या पिलाच्या आकाराच्या मांसाच्या तुकड्यांची वांती एकसारखी होते. उंदराचे विष पचनाअगोदर शरिरात पसर-णारे, चिकित्सेला कठीण, पुनः पुनः प्रकुपित होणारे, बराच काळ लोटल्यानंतर देखील प्रकुपित होणारे, दीर्घकाल टिकणारे असते. ते शरिरात गेले असता जेव्हा मूर्च्छा, सर्वांगावर सूज, शरिराचा रंग बदलणे, शरिरात वाजवीपेक्षां अधिक ओलसरपणा निर्माण होणे, आवाज ऐकू न येणे, ज्वर, डोके जड, तोंडातून लाळ येणे, रक्ताची वांती होणे, ही लक्षणे होतात तेव्हा उंदराचे विष असाध्य समजावे. तसेच बस्ति ह्या अवयवावर सूज, ओठांचा रंग वाईट होणे, उंदरासारख्या गाठी सर्व शरिरावर उठणे, चुचुंदरीच्या चवीसारखी चव व वासासारखा वास येणे, ही लक्षणे झाली असता देखील उंदराचे विष असाध्य समजावे. **उंदीर चावल्याची लक्षणे**–गाठी, सूज, कमळाच्या बीजासारख्या गाठी उठणे, चकंदळे, भोवळ येणे, खूप पुळ्या उठणे, धावरे, किटिभ प्रकाराचे कुष्ठ, पेर फुटल्यासारखे वाटणे, अत्यन्त वेदना होणे, मूर्च्छा. श्वास, अंग गळणे, ज्वर, अशक्तपणा, तोंडाची चव जाणे, दम लागणे, कंप, वांती होणे, रक्तस्राव, रोमांच उभे राहणे ही लक्षणे उंदीर चावला असता होतात. **चिकित्सा**— कढत केलेल्या तुपाने उंदीर चावल्या ठिकाणी डाग द्यावा. तसेच रक्तस्राव करावा. शिरस, हळद, कोष्ठ, केशर, गुळवेल ह्यांचा लेप करावा. शिरस व घोसाळे यांचे मूळ, गेळफळ, देवडांगरीचे फळ ( ह्यांचे चूर्ण ) दह्यासह पाजावे. ते पिऊन रोग्याने विष ओकावे. नंतर गेळफळ, वेखंड, देवडांगरीचे फळ, कोष्ठ हे गोमूत्रात वाटून दह्यासह चाटावे. सर्व प्रकारच्या उंदराच्या दंशावर हा योग सुखावह आहे.

**मूषिका**–स्त्री., प्राणि० अस्याः शरीरेण सिद्धं तैलं गुदभ्रंशे पानाभ्यङ्गार्थमुपयुज्यते मूषिका निर्गतान्त्रां कृत्वा महत्पञ्चमूलस्य प्रस्थं क्षीरप्रस्थे त्रिगुणितजले विपचेत्। क्षीरप्रस्थेऽवशिष्टे तैलकुडवं दत्त्वा भद्रदार्वादिकल्क-पाकं कृत्वा तैलं साधयेत् ( सुचि. २०.६२ )

चिचुंदरी, उंदरीण–हिचा उपयोग गुदभ्रंश नाशक तेला करिता होतो. पिणे, अभ्यंग अशा दोन्ही प्रकारानी हे तेल उपयुक्त. आतडी काढून चुचुंदरी, पंचमुळे, मोठी पंचमूळे ६४ तोळे, दूध ६४ तोळे, तिप्पट पाणी घालून उकळावे. ६४ तोळे शिल्लक राहिल्यानंतर १६ तोळे तेल घालून देवदारु इ० ची चटणी घालून तेल तयार करावे.

**मूषिकाह्वया**–स्त्री., द्रवन्तीभेदः ( चक. १२.३; ध. १.२२९; पृ. ५४ ) द्रवन्तीभेद.
**सुतश्रेणी** ( रापरि. ४.१६; पृ. ३३६ ) उंदिरकानी.

**मूषोदर**–न., **शरावसंपुटम्**: दोन परळांचे संपुट.

**मृक्षण**–न., तैलम् ( ध. ६.१२५; पृ. २३३ ) तेल.

**मृग**–पु., प्राणि० हरिणः ( चसू. १३.११ ) **मृगमांसगुणाः–एतन्मांसं हिमं रुच्यं ग्राहि दोषत्रयापहं षड्रसं, बलदं पथ्यं, लघु, हृद्यं, कफास्रजित्** ( ध. ६.४००; पृ. २७० )
हरीण–मांस थंड, चवदार, ग्राहि, त्रिदोषशामक, सहाही रसयुक्त, बलवर्धक, पथ्यकर, लघु, हृदयाला हितकारक आहे.

**( मृगा )**–स्त्री., **महाबला** ( रा. ४.४२५; पृ. ६५ ) महाबला. मोठा चिकणा.

**( मृग )–गामिनी**–**विडङ्गम्** ( ध. २.११; पृ. ७१ ) वावडिंग.

**–चर्मज**–वनस्पति० जवादि (रापरि.१२.६; पृ.३७५) हरणाच्या चामड्यापासून केलेली कृत्रिम कस्तुरी.

**–चारिन्**–पु., **प्राचीनो रसाचार्यः** ( र. ८.७७ ) प्राचीन रसशास्त्री ऋषि.

**–चारिमुनीन्द्र**–पु., **प्राचीनो रसाचार्यः** ( र. १७.१०० ) प्राचीन रसशास्त्रज्ञ ऋषि.

**–चिर्भिटी**–स्त्री., वनस्पति० **मृगाक्षी** (रा. ७.२५८; पृ. ४२ ) काकडीचा एक प्रकार. चिभडे.

**–तृष्णिका**–स्त्री., **मृगजलम्** ( चक. १.८ ) मृगजल.

**–दूर्वा**–स्त्री., दूर्वा० **गण्डदूर्वा, श्वेतदूर्वा, नीलदूर्वा** ( र. ११.५२ ) एक प्रकारची दूर्वा, हरळी.

**–द्विज**–पु., **मृगपक्षी** (चचि.१७.९३) पशु आणि पक्षी.

**–नाभि**–स्त्री., भेषजद्रव्य० **कस्तूरिका** (ध. ३.२८; पृ. १००; र. २१.१९०) कस्तूरी.

**–पित्त**–न., **हरिणस्य द्रवपित्तम्, इदं विषहरम्, जीवननामागदेष्वेकं द्रव्यम्** ( असंसू. ८.२९ ) हरिणाचे पातळ पित्त; हे विषहर, जीवन नावाच्या अगदातील एक द्रव्य.

**–प्रिय**–न., वनस्पति० **तृणाढ्यम्** ( रापरि. ८.५३; पृ. ३६१ ) तृणविशेष.

**–प्रियक**–पु., सर्प० **गोनसः, बिलेशयेष्वेकः, वातरोगेऽयं पथ्यः** ( सुसू. ४६.७८-८२ ) सापाचा प्रकार, घोणस. बिळात राहणारांपैकी एक. वातरोगात याचे मांस पथ्यकर.

**–भक्षा**–स्त्री., वनस्पति० **गन्धमांसी** ( रा. १२.९१; पृ. १०५ ) जटामांसी.

**–भोजिनी**–स्त्री., वनस्पति० **इन्द्रवारुणी** ( सुचि. १७.३७ ) इंद्रावण.

**–मद**–पु., भेषजद्रव्य० **कस्तूरिका** ( ध. ३.२८; र. १७.१२८; पृ. १०० ) कस्तुरी.

**–मातृका**–स्त्री., **स्वल्पा पृथूदरा हरिणजातिः जाङ्गलमृग०** ( चसू. २७.४५; चसू. १५.७ ) **अल्पा पृथूदरा चतुरङ्गस्त्री ' भेदली ' इति लोके; जङ्गालवर्गे, अस्याः मांसं सर्वप्राणिनामाहारार्थे हितम्, गुणाः– शीता असृक् पित्तशमनी सन्निपातक्षयश्वासकासहिक्काऽरुचिप्रणुत्** ( सुसू. ४६.५८; सुसू. २०.५
मोठ्या पोटाची लहान हरणाची जात. निर्जल प्रदेशातील पशु. हिला भेदली म्हणतात. हिचे मांस सर्वांना आहाराकरिता हिताचे. गुण–थंड, रक्तपित्त, सन्निपातज्वर, क्षय, श्वास, खोकला, उचकी, अरुचि नाशक.

**–रसा**–स्त्री., **महाबला** ( रा. ४.४२५ पृ.६५ ) मोठा चिकणा.

**–लिण्डिक**–न., भेषजद्रव्य० **मृगविट्सदृशं कर्कटाख्यम्** ( अहसू. ६.१३८ ) हरणाच्या लेंडीसारखी काकडी, मेका.

**–(लिण्डिका)**–स्त्री., वनस्पति० **बिभीतकः आसवोपयुक्तेषु फलेष्वेका** ( चसू. २५.४९ ) बेहडा. आसवाला उपयुक्त एक फळ.
**गाङ्गेरुकीफलम्** ( शिवकोष १२७ ) नागबला.

**–वर्ग**–पु., **मांसवर्गे प्राणिनः, एणकुरङ्गहरिणशशशम्बरचारुष्कशरभाद्याः मृगाः स्मृताः** ( अहसू. ६.४३ )
मांसवर्गाचा प्राणी. काळ्या वर्णाचा, लहान, चपळ गतीचा, तांबड्या रंगाचा, बिळात रहाणारा, सांबर. सुंदर शरिराचा, आठ पायांचा, असे पशु. मृगवर्गात आहेत.

**-विषाण**–न., **मृगशृङ्गं हरिणशृङ्गं वा** (र. २३.१७) मृगशृंग, हरीणशृंग.

**-व्यालविदष्ट**–वि., **दुष्टमृगभक्षितम्** (सुसू. ४५.११२) पशु व हिंस्र प्राण्यांनी केलेला दंश.

**-शिरस्**–न., नक्षत्र० **मृगशीर्षम्** (असंसू. ८.९२) मृगशीर्ष नावाचे नक्षत्र.

**मृगाक्षी**–स्त्री., **वनस्पति० इन्द्रवारुणीभेदः** (ध.१.२५२; पृ.५९.) इंद्रावणप्रकार, कवंडळप्रकार.

**त्रपुस०** (रा. ७.२५७; पृ. ४३) काकडी.

**मृगाङ्कपोटलीरस**–पु., **पारदयोग० षोडशनिष्कपरिमितान् शङ्खनाभीन् गोदुग्धेन पेषयित्वा मूषां कुर्यात्। तत्रार्धनिष्कं सूतभस्म निष्कत्रयं च गन्धकं निक्षिप्य रोधयेन्मृदा च लिप्त्वा गजपुटेन पचेत्। मूषया सह चूर्णयेत् एवमेतद्रसायनं सिद्धं भवति। मात्रा–गुञ्जा परिमिता। फलं–क्षयनाशः** (र. १४.२३-२५)

या नावाचे सिद्धौषध. १६ तोळे शंख नाभीचे सूक्ष्म चूर्ण करून ते गाईच्या दुधात घोटून त्याची मूस करावी. तीत अर्धा तोळा पाऱ्याचे भस्म तीन तोळे गंधक घालून वरून मातीने लपेटावे व गजपुट द्यावे. मूसेसह चूर्ण करावे. म्हणजे हा योग सिद्ध होतो. क्षयनाशक. प्रमाण १ गुंज.

**मृगाण्डजा**–स्त्री., **भेषजद्रव्य० कस्तूरिका** (ध. ३.२८; पृ. १००) कस्तूरी.

**मृगादनी**–स्त्री., **वनस्पति० चिर्भट०** (सुचि. ९.५८) चिभड्याचा एक प्रकार.

**इन्द्रवारुणी** (सुउ. २८.७; असंउ. ४२; रा. ७.२५७; पृ. ४२)

ध. १.२४८; पृ. ५८; १.२५२; पृ. ५९) **कर्कटिका** (सुक. ५.६९) इंद्रवारुणी, कवंडळ, कडु काकडी.

**महाबला** (रा. ४.४२४; पृ. ६५) मोठा चिकणा.

**मृगादिनी**–स्त्री., **वनस्पति० गवाक्षी** (असंउ.६; इन्दु.) गवाक्षी; कवंडळ.

**मृगारि**–पु., **वनस्पति० शिग्रुभेदः** (रा.७.६६; पृ. १४२) शेवग्याचा प्रकार.

**मृगेक्षणा**–स्त्री., **वनस्पति० कर्कटी** (रा. ७.२५७; पृ. ४२) काकडी.

**मृगेन्द्रवारुणी**–स्त्री., **वनस्पति० इन्द्रवारुणी** (असंसू. १४.३) इंद्रावण, कवंडळ.

**मृगेन्द्राणी**–स्त्री., **वनस्पति० आटरूषः** (रा. ४.२९; पृ. ११) अडुळसा.

**मृगेर्वारु**–पु., **वनस्पति० इन्द्रवारुणीभेदः** (ध. १.२५२; पृ. ५९) इंद्रावणाचा एक प्रकार.

**कर्कटीभेदः** (रा. ७.२५७; पृ. ४२) काकडी प्रकार.

**मृगेर्वारुक**–पु., **प्राणि० मृगभक्ष्यः, शृगालाकृतिः, गुहाशयेष्वेकः** (सुसू. ४६.७२)

हरीण इ० खाणारा कोल्ह्यासारखा, गुहेत रहाणारा प्राणी.

**मृगेष्ट**–पु., **वनस्पति० मुद्गर** (रापरि. १०.२२; पृ. ३६९) मोगरा.

**मृगैर्वारु**–स्त्री., **वनस्पति० इन्द्रवारुणी** (सुउ. ३०.६; (असंसू. ८.४२) कवंडळ.

**मृगैर्वारुकमुख**–न., **स्वस्तिकयन्त्र० मृगैर्वारुकमुखसदृशं यन्त्रम्** (सुसू. ७.१०) स्वस्तिक यन्त्राचा प्रकार.

**मृगोर्वारु**–स्त्री., **वनस्पति० गवाक्षी** (असंउ, ४) कवंडळ. गवाक्षी.

**मृग्य**–वि., **मृगस्येदं, मृगसम्बन्धिमांस०, अष्टविधमांसेषु एकं मृग्यमांसम्** (अहृसू. ६.५४)

पशूंच्या आठ प्रकारच्या मांसापैकी एक प्रकार.

**मृङ्क्षण**–न., **म्रक्षणम्। तैलघृतनवनीतादिनाऽभ्यङ्गः** (र.२५.३८) तेल तूप लोणी वगैरेंनी केलेला अभ्यंग.

**मृजा**–स्त्री., **परिमार्जनम्** (चसि. ११.२९) **उद्वर्तनम्** (चनि. ४.५) **शुद्धप्रभा** (सुचि. २४.३०) **शुद्धिः**, (चवि. ७.१०; सुचि. २४.३९)

परिमार्जन, शुद्धि, उटणे; शुद्ध प्रभा, तेज.

**-वर्जन**–न., **शुद्धिकरस्नानादिवर्जनम्** (चवि. ७.१०) स्नान वगैरे न करणे.

**मृडः**–पु., **श्रीशङ्करः मृडयति सुखयति शं करोति इति मृडः** (र. १३.१२)

जो सुखवितो, कल्याण करतो असा शंकर.

**मृणाल**–न., **बिसम्** (ध. ४.१६१; पृ. १६७, सुउ. ३९.३११-१६७; सुचि. ५.८) **भोजनस्य पूर्वं योज्यं, न तु भुक्ते कदाचन** (सुसू. ४६.४६४) कमळाचे तंतु किंवा देठ हे जेवणाच्या अगोदर खावे. जेवणानंतर केव्हाही खाऊं नयेत.

**पद्ममूलात्स्थूलप्ररोहः** (सुशा. ९.१०) **पद्मनालम्** (सुसू. ४६.२९८) **तनुकमलतन्तुः** (चचि.१४.९) कमळाचा देठ, कमळाच्या मुळाचे पाळ.

**वनस्पति० उशीरम्** (सुचि. २.४०; ध.३.१४; पृ. ९६) काळा वाळा.

**(मृणाली)**–स्त्री., (बिसम् ध.४. १६१; पृ. १६७) कमलभेदः (चचि. ८.१२९) कमळाचे देठ, कमळाचा प्रकार.

**(मृणाल)–कण्ठ**–पु., जलचारिपक्षि० (चसू. २७.४२; असंसू. ७.८२) प्लववर्गीयः पक्षि० (सुसू. ४६.१०५ ड.) जलचर पक्षी.

**–वलया**–वि., मृणालनिर्मितवलयवती, कमलनालस्य कङ्कणानि धार्यते यया सा (कान्ता) (असंसू. ४.३६)
कमळाच्या दांड्याच्या बांगड्या घालणारी स्त्री.

**मृणालक**–न., बिसम् (ध. ४.१६१; पृ. १६७) कमलनाळ.

**(मृणालिका)**–स्त्री., बिसम् (ध. ४.१६१; पृ. १६७) कमळनाळ.

**मृणालासव**–पु., आसुत० नादेयमत्स्यभक्षणोत्तर-मनुपानत्वेन विहितोऽयम् आसवः (सुसू. ४६.४३३)
कमळाच्या देठाचे आसव, नदीचे मासेयुक्त भोजन झाल्यावर अनुपान म्हणून हे आसव योग्य आहे.

**मृणालिनी**–स्त्री., बिसम् (रा. १०.२५८; पृ. १६७) कमळनाळ.

**मृत**–वि., त्यक्तप्राणः (सुशा. ५.४७) 'शोधयित्वामृतं-सम्यग्द्रष्टव्योऽगविनिश्चयः।' अत्र मृतपदम् आसन्नमरणवाचकम् इत्यवधेयम्, मृतस्य चिकित्सा-विषयाभावात्; वृक्षप्रपातविषमपतितं मृतमम्भसि। उद्बद्धं च मृतं सद्यश्चिकित्सेन्नष्टसंज्ञवत् (सुक. ५.५५)
मेलेला, मेल्यासारखा. अंगप्रत्यंगाचे ज्ञान करून घेण्याकरिता मृताचे शव-विच्छेदन करावे. पाण्यात बुडालेल्या, व झाडावरून पडलेल्या मृताची मूर्च्छित मनुष्यासारखी चिकित्सा करावी. येथे मृत शब्द आसन्नमरण वाचक आहे.
भस्मरूपं प्राप्तः (पारदः) लोहं वा (र. १.३४; र. ८.२७)
भस्म झालेला पारा किंवा कोणताही धातु.
न., वाराहीकन्दः (र. २७.११७) डुक्करकंद.
वत्सनाभः (र. २७.११७) बचनाग.

**(–गर्भा)**–स्त्री., मृतो गर्भो यस्याः सा स्त्री, मृतगर्भायाः स्त्रियः लक्षणानि– यस्याः अन्तःकुक्षौ गर्भो म्रियते तस्याः स्तिमितं स्तब्धमुदरमाततं शीत-मश्मान्तर्गतमिव भवत्यस्पन्दनश्च गर्भः अस्याः शूलमधिकमुपजायते, न चाव्यः प्रादुर्भवन्ति, योनिर्न प्रस्रवति, अक्षिणी चास्याः स्रस्ते भवतः, किं च असौ ताम्यति, व्यथते, भ्रमते, श्वसिति, अरतिबहुला च भवति, न चास्या वेगप्रादुर्भावो यथावदुपलभ्यते, इत्येवंलक्षणां स्त्रियं मृतगर्भां विद्यात् (चशा. ८.३०; असंशा. ४.२८)
ज्या स्त्रीचा गर्भ पोटात मेला आहे अशी स्त्री. लक्षणे– पोट स्थिर, जखडलेले, ताणलेले, थंड, जणु काय पोटात दगडच आहे असे होते, हालचाल नसते, शूल होतो, वेणा नाहीत, योनिस्राव नाही, डोळे गळतात, अंधेरी येते, वेदना, भ्रम, श्वास, बेचैन होते.

**–जीवन**–पु., विषमज्वरघ्नो योग० (र. १२.३८-४०) सिद्धौषधाचे नाव.

**–जीविन्**–पु., तिलकः (रा. १०.२६६) तिळवा, लोध्र.

**–वत्सका**–स्त्री., जातमात्रं मासात्पक्षाद्वर्षाद्वित्रि-वर्षैर्वा यस्या अपत्यं म्रियते, सा स्त्री (र. २२.५६)
ज्या बाईची मुले महिना पंधरा दिवसांनी, वर्ष दोन-वर्षांनी मरतात अशी स्त्री.

**–संजीवन**–पु., योग० सूचिकाऽऽभरणापरपर्यायो रसः (र. १२.७६-७९)
या नावाचे सिद्धौषध. याला सूचिकाभरण असेही नाव आहे.
योग० पारदलोहत्रिकटुककङ्कुष्ठमनःशिलाहरिताल-कुम्भीचित्रकभृङ्गराजमारीषतण्डुलीयकमाक्षिक-हस्तिशुण्डीस्तुल्यभागास्तदर्धभागौ च पारदगन्धौ दिनत्रयमार्द्रकरसेन भावयित्वा वालुकाग्निना पचेत्। ततश्च वालुकायन्त्रावस्थायामेव भङ्गाजम्बीरनिर्गुण्डीचाङ्गेरीणां पृथग्रसं चतुर्दश-दिनं यावन्निक्षिपेत् स्वाङ्गशीतं पुनरार्द्रकरसेन मर्दयि-त्वोपयोजयेत्। वल्लप्रमाणोपसेवितोऽयं सन्निपाता-दिरोगान् अपहन्ति (र. १२.१२९-३२)
योग–पारा, लोहभस्म, त्रिकटु, कंकुष्ठ, मनशीळ, हरताळ, कुंभी, चित्रक, माका, पोकळा, तांदुळजा, मध, कवंडळ, ही समभाग यांच्या निमे पारा गंधक घेवून कज्जली करून सर्वांना आल्याच्या तीन भावना देऊन वालुकाग्नीने पचन करावे व त्याच वेळी भांग, निंबु, निर्गुंडी, चुका यांचा प्रत्येकाचा रस चौदा दिवस टाकीत असावे. नंतर थंड झाल्यावर पुन्हा आल्याच्या रसाबरोबर घोटून वालप्रमाणाने सन्निपातादिरोगांवर द्यावे.

योग०, पारदगन्धौ एकद्विभागौ वत्सनाभहरिताल-कङ्कुष्ठमनःशिलाहिङ्गुलोहचित्रकत्रिकटुभृङ्गराजस्वर्ण-माक्षिकाभ्रकहस्तिशुण्ठ्यतिविषाकुम्भीतण्डुलीयक-ताम्रभस्मानि प्रत्येकं भागैकमित्येतत्सर्वमार्द्रकरसेन त्रिदिनं मर्दयेत् । ततश्च काचकूप्यां पाचयेत्पाचनाव-सरे च जम्बीरत्रिफलानिर्गुण्डीनां रसं प्रत्येकं पल-त्रयमात्रं चाङ्गेर्याश्च पलमात्रं कूप्यां प्रक्षिपेत् । सप्त-दिनपर्यन्तं च पाचयेत् । ततःस्वाङ्गशीतलमुद्धृत्या-ऽऽर्द्रकरसेन मर्दयित्वा शोषयेत् । गुञ्जाद्वयमात्राप्र-युक्तोऽयं सन्निपातज्वरजिद्वरः (र.१२.१३३-१३९) सिद्धौषधाचे नाव. वरील मृतसंजीवनी सारखीच बहुतेक द्रव्ये आहेत व रीतिही जवळ जवळ तशीच आहे. सन्निपात ज्वरहर.

अगद०, स्पृक्काप्लवस्थौणेयकादिः सुगन्धबहुलैर्द्रव्यैः कृतः विषशमनो योगः ( चचि. २३.५४-६०; असंउ. ४० )

विषनाशक औषध. पिंडिका, नागरमोथा, गंठीवन, इत्यादी सुगंधी द्रव्यांनी केलेला विषशामक योग. न., भेषज० मृतस्य मृतकल्पस्य वा अमृतवत् संजीवकं भेषजम् ( चचि. २३.३७ )

मनुष्य मेला किंवा मेल्यासारखा असतांना अमृता-सारखा उपयोगी पडणारा योग.

**-( संजीवनी )**–स्त्री., वनस्पति० गोरक्षदुग्धी ( रापरि. ५.५३; पृ. ३४४ )

तांबडा रस निघणारी पुष्कळ पानांची वनस्पती.

योग० कान्तलोहाभ्रकमाक्षिकाणां सत्वानि हीरक-स्वर्णपारदानां भस्मानि च सप्ताहं निम्बुकाद्यम्लरसेन पिष्ट्वा गोलकीकृत्य च गोजिह्वा काकतुण्डीहरीतकी-निर्गुण्डीमधुसैन्धवैर्लेपयित्वा भूधरयन्त्रे पचेत् । एवं पक्षपर्यन्तं कुर्यात्ततो यवचिञ्चापलाश-बिभीतकसर्षपकार्पासतण्डुलैर्लिप्तायां मूषायां स्वल्पं स्वल्पं टङ्कणं श्वेतकाचं च दत्वा शोषयेत्तदनन्तरं बिडयोगेन समभागं स्वर्णं जारयेत् । इयं वटी संवत्सरपर्यन्तं मुखे धारिता सती शुक्रस्तम्भं कुरुते जरां च हरति ( र. ३०.१०१-१०५ )

मृतसंजीवन नावाचे सिद्धौषध. कांतलोह, अभ्रक, सुवर्णमाक्षिक, यांची सत्वे, हिरा, सुवर्ण, पारा, यांची भस्मे सात दिवस निंबु इ० आंबट रसाने खलून गोळा करावा, त्याला गोजिव्हा, कावळी, हिरडा, निर्गुंडी, मध, व सैंधव यांचा लेप देऊन भूधरयंत्रात पुट द्यावे. १५ दिवस पुटे देऊन नंतर जव, पळस, चिंच, बेहडा, मोहरी, कापशी, व तांदूळ यांचा लेप दिलेल्या मूषेमध्ये अगदी थोडा टाकणखार व पांढरी काच घालून वाळवावे. नंतर बिडाच्या साह्याने समभाग सोने जारण करावे व वटी बनवाव्या. १ वर्षपर्यंत रोज १।१ गोळी तोंडात धरावी. शुक्र स्तंभन करून म्हातारपण नष्ट करते.

**मृताजीवी**–स्त्री., गोरक्षदुग्धी (रापरि. ५.५३; पृ. ३४४)

तांबडा रस निघणारी पुष्कळ पानांची वनस्पती.

**मृतालक**–न., तुवरी (सौराष्ट्री) (ध. ३.१०५; पृ. ११६)

तुरटी.

**मृतोत्थापन**–पु., योग० अभ्रताम्रलोहानां प्रत्येकं पलं घृते दुग्धे च पचेत् तस्मिन् विडङ्गत्रिफलाचित्रक-त्रिकटूनां प्रत्येकं पलमात्राणां चूर्णं क्षिपेन्मर्दयेच्च । मात्रा–एकमाषतः आरभ्य क्रमादष्टमाषपर्यन्तम् । अनुपानं–घृतं मधु मद्यं दुग्धं नारिकेलोदकं वा । पथ्यं–शर्कराशाल्यन्नमांसरसादि । फलं–हृच्छूल-पार्श्वशूलगुल्मशिरःशूलामवातकटिग्रहाग्निमान्द्यक्षय-कुष्ठकासश्वासविचर्चिकाश्मरीकृच्छ्राणां नाशः ( र. १८.१२२.३० )

मृतोत्थापन नावाचे सिद्धौषध. अभ्रक, तांबे, लोखंड, यांचे भस्म प्रत्येकी चार तोळे, तूप, दूध यात शिजवावे. त्यात वावडिंग, त्रिफळा, त्रिकटु, चित्रक यांचे चार चार तोळे चूर्ण घालून घोटावे. एक मासा प्रथम घेऊन क्रमाने आठ मासे पर्यंत वाढवावे. **अनुपान**–तूप, मध, दारू, दूध किंवा नारळाचे पाणी. **फळ**–हृदयाचा डोक्याचा व फासळ्यातील शूळ, गुल्म, आमवात, कंबर धरणे, अग्निमांद्य, क्षय, कुष्ठ, खोकला, श्वास, हाताला व अंगाला चिरण्या पडणे, मूतखडा, लघ्वीला कष्ट हे उपद्रव नाहीसे करतो.

**मृत्तिका**–स्त्री., तुवरी ( ध. ३.१०६; पृ. ११६ )

तुवरी, खारट माती, तुरटी.

गुडूची ( ध. १.४; पृ. ८ ) गुळवेल.

**मृद्**-कृष्णमृत्तिका गुणाः– पावनी रससिद्धि-विधायिका, लेपेन योजिता चेत् दंशादिसर्वशोफानां हन्त्री ( ध. ३; परि. ३१; पृ. १३३ )

काळी माती. गुण–पवित्र करणारी, पाऱ्याच्या क्रियांत सिद्धि देणारी. लेपाने दंश, सूज नाशक.

**-क्षार**–न., मूलकम् ( ध. ४.३३; पृ. १४० ) मुळा.

**-पञ्चक**–न., रसप्रयोगकुशलैः कीर्तिताः पञ्च

मृत्तिकाः। ताश्च इष्टिका गैरिकं लवणं भस्म वल्मीकमृत्तिका चेति ( र. १०.८४ )
रसशास्त्रामध्ये रसप्रयोगाकरिता सांगितलेली पांच प्रकारची माती. विटेचे चूर्ण, गेरु, सैंधव, राख व वारुळाची माती.

**–वर्धमानक**–पु., कुरुक्षेत्रात्पूर्वदेश०
( काखिल. २५.८ ) देवीपुराणे षट्चत्वारिंशेऽध्याये वङ्गसमीपवर्तिवर्धमानदेशोल्लेखः समुपलभ्यते ( काउ. )
या नावाचा देश. कुरुक्षेत्राच्या पूर्वेकडील देश.

**मृत्यु**–पु., **शरीरेन्द्रियात्ममनसां वियोगः** ( सुसू. १.२५ ( ४ )) **मरणम्, द्विप्रकारको मृत्युर्दोषागंतुजभेदेन** ( सुसू. ३४.७ )
**अथर्ववेदविदः एकोत्तरं मृत्युशतं प्रचक्षते। तत्रैकः कालमृत्युः, शेषाः सर्वे आगन्तवः ( अपमृत्यवोऽकालमृत्यवो वा ) स्मृताः। अपरं च जलमग्निर्विषं शस्त्रं स्त्रियो राजकुलानि चैतेऽकालमृत्यवः** ( सुसू. ३४.६; चशा. ६.२८; असंसू. ९.११३ )
मरण. शरीर, इंद्रिये, आत्मा, व मन यांचा वियोग. प्रकार दोन. १ दोषज व २ आगंतु. १ रोग होऊन २ अचानक अपघाताने होणारा. अथर्ववेदज्ञ १०१ मृत्यु सांगतात. पैकी एक योग्य वेळी होणारा तो काल मृत्यु व बाकीचे अकाली होणारे. आगंतु– ( अपमृत्यु किंवा अकालमृत्यु ) पाणी, अग्नि, विष, शस्त्र, स्त्री व राजकुल यांनी येणारा मृत्यु.
**ज्वरः, मृत्युकारणान्मृत्युः** ( चचि. ३.१३; सुउ. ३९.९५ ) मृत्यूला कारण होणारा, ज्वर.

**–काल**–पु., **प्रतिपुरुषनियतो मृत्युकालः** (चशा. ६.२८) प्रत्येक व्यक्तीचा ठरलेला मरणकाल.

**–नाशन**–पु., खनिज० पारदः ( रा. १३.४२; पृ. २१४ ) पारा.

**–वारि**–न., **मृत्युरेव वारि** ( चइ. ११.११ )
मृत्युरूपी पाणी.

**–सामान्य**–न., **मृत्युजनकदैवसाम्यम्** ( चवि. ३.१३ ) मरणकारक दैवाचे साम्य.

**–हर**–वि., **मृत्युञ्जयः मृत्युनिवारकः** ( सुसू. १.२१ )
मृत्यु टाळणारा.

**–हारिन्**–पु., **योग० चतुरङ्गुलानि तिलोत्सेधमयःपत्राणि धात्र्या रसे एकविंशतिवारं प्रतप्य निर्वापयेत्ततश्च शतपलं स्थाल्यां क्षिप्त्वा तदुपरि धात्र्या रसं प्रक्षिप्य भस्मराशौ निधापयेत्। प्रतिमासं लोहदण्डेन तदवघट्टयेत्। रसेऽशुष्यमाणेऽन्यरसं प्रक्षिपेत्। वत्सरादनन्तरमायसपत्राणि द्रवीभवन्ति। ततश्च तं द्रावमायसेन चालनीसदृशपत्रेण लोहभाण्डेऽवगाल्याऽवलेहत्वोदयं यावत्पाचयेत्। अनुपानम्–समांशे मधुसर्पिषी। जीर्णे औषधे मांसरसक्षीरसाज्यषष्टिकौदनादीनां भोजनम्। एवमेकवर्षपर्यन्तम् आचरेत्। वर्षमन्यत्कुटीं प्रविशेत्। फलम्–एवमनेन रोगजरामृत्युशस्त्राग्निविषजलैरनभिगम्यो भवेद्वर्षशतं च सर्वभावेष्वतीन्द्रियो जीवेत्** ( र. २८.९४-१०१ )
मृत्युहारी नावाचे सिद्धौषध. तिळाइतके पातळ चार अंगुळांचे लोहाचे पत्रे पुन्हा पुन्हा लाल तापवून एकवीस वेळा आवळ्याच्या रसात विझवावे, ४०० तोळे थाळीत टाकून त्यावर पुन्हा आवळ्याचा रस टाकून ती बंद करून भस्माच्या राशीत ठेवावी. प्रत्येक महिन्याला लोखंडाच्या दांड्याने ते ढवळावे. मिश्रण सुकले तर पुन्हा आवळ्याचा रस घालावा. एक वर्षानंतर सर्व पत्रे द्रवरूप होतात. नंतर तो द्रव लोखंडाच्या चाळणीने लोखंडाच्या भांड्यात गाळून चाटण होईल इतके कढवावे. समभाग मध, तूप घेऊन ते घ्यावे. औषध जिरल्यावर मांसरस, दूध, तूप, साठे तांदूळ इत्यादींचा आहार घ्यावा. एक वर्ष याप्रमाणे वागावे. एक वर्षभर कुटीप्रवेश करून सेवन करावे. फळ– रोग, म्हातारपण, मृत्यु, शस्त्र, अग्नि, विष, जल यांचा उपसर्ग होणार नाही व शंभर वर्षे उत्तम ज्ञानी अवस्थेत जगेल.

**मृत्युञ्जय**–पु., **पारदयोग० हरितालताम्रभस्मपारदगन्धकाभ्रकजेपालान् प्रत्येकं शाणमात्रान् टङ्कणमनःशिलामाक्षिकाणि शाणद्वयमितानि वत्सनाभं च द्विशाणपरिमितं मिलित्वा चित्रकरसेन च भावयित्वा जायते। अयं सर्वज्वरविनाशनः** ( र. १२.४७ )
मृत्युंजय नावाचे सिद्धौषध. हरताल, ताम्रभस्म, पारा, गंधक, अभ्रक, जयपाळ, समभाग टाकणखार, मनशील, सुवर्णमाक्षिक व बचनाग दोन दोन भाग मिसळून चित्रकाच्या रसाची भावना द्यावी. हा सर्वज्वरनाशक.

**सिद्धौषधि० क्षारद्वयं त्रिकटु लवणपञ्चकं मिश्रितैतेषां समभागं पटचूर्णं कृत्वा तत्समां पारदगन्धकयोः कज्जलिकां प्रक्षिप्य सर्वमेकत्र दिनत्रयं**

**मर्दयेत्। मात्रा–पञ्चगुञ्जा। फलं–सन्निपातनाशनम्। अनुपानं–चित्रकार्द्रकसैन्धवानां चूर्णम्। पथ्यं–दध्योदनः** ( र. १९.७-१५ )

एक सिद्ध औषध. जवखार, सज्जीखार, त्रिकटु, पाच मिठे समभाग, बडीशेप सर्वांच्या समभाग. सर्व वस्त्रगाळ चूर्ण करून त्यात पारा व गंधक यांची कज्जली घालून तीन दिवस घोटावी. प्रमाण ५ गुंजा; संनिपातनाशक. अनुपान–चित्रक, आले, सैंधव. पथ्य–दही भात.

**योग० माक्षिकहरितालताम्रवत्सनाभमनःशिला-जयपालपारदगन्धका मुशलीरसेन मर्दिताः–कुक्कुटपुटेन च पाचिता मृत्युञ्जय इति ख्यातिं भजन्ति । अयं योगो नवज्वरं सान्निपातिकज्वरं च नाशयति । तत्र बल्लद्वयं प्रमाणं दधिभोजनं च पथ्यम्** ( र. १२.१०९-११ )

एक औषध. सुवर्णमाक्षिक, हरताळ, ताम्रभस्म, बचनाग, मनशीळ, जयपाळ, पारा, गंधक, मुसळीच्या रसाने खलून, कुक्कुटपुट देऊन, भाजून घ्यावे. **गुण**—नवज्वर, सन्निपातज्वर नाशक. प्रमाण दोन बाल. पथ्य–दहीभात.

**मृत्सा**–स्त्री., **मृत्तिका** (ध. परि. ३.३०; पृ. १३३) माती. **भेषजद्रव्य० सौराष्ट्री** (ध. ३.१०५; पृ. ११६) तुरटी.

**मृत्स्न**–वि., **पिच्छिलम्** (सुनि. ६.१०; सुचि. १५.९) बुळबुळीत.

( **मृत्स्ना** )–स्त्री., **खनिज० तुवरी** ( ध. ३.१०५; पृ. ११६ ) तुरटी.

**मृत्तिका** ( धपरि. ३.३०-१३३ ) माती.

**मृत्स्नांशुक**–न., **मृत्कर्पटम् चिक्कणमृदा लिप्तं कर्पटम्, रसपूरितघटमुखस्य कुपिकायाश्च पार्श्वस्यावलेपनार्थ-मुपयुज्यते** ( र. १७.१३७ )

चिक्कणमाती लावलेले वस्त्र. पारा घातलेल्या मडक्याच्या तोंडावर व कुपीच्या भोवती लावण्याकरिता अशा मातकापडाचा उपयोग करतात.

**मृद्**–स्त्री., **भेषजद्रव्य० मृत्तिका छर्दिनिग्रहगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१४ ) **अतिमात्रेण मृद्भक्षणं श्वयथुमापादयति** ( सुचि. २३.४ ) **पाण्डुरोगे-मृद्द्वेषणाय तल्लौल्यतृप्त्यर्थं विडङ्गेनातिविषया पाठ्या निम्बपल्लवैर्वार्ताकैः कटुरोहिण्या मूर्वया कौटजैर्भा-विता मृत्तिकोपयोज्या** ( असंचि. २१ ) **कृष्णमृत्तिका** ( सुचि. २.४६ ) **केदारमृत्तिका इयं रक्तपित्तशमनी** ( सुउ. ४५.३३ )

माती. ओकारीनाशक वर्गात आहे. माती अधिक खाण्याने सूज येते. पांडु होतो. पांडुरोगात मातीचा तिटकारा येण्याकरिता व मातीची लालसा तृप्त व्हावी म्हणून वावडिंग, अतिविष, पहाडमूळ, निंबाची पाने, वांगे, कुटकी, मूर्वा, कुडा पाळ किंवा इंद्रजव यांच्या भावना देऊन उपयोगात आणावी. काळी माती. शेतांतील माती रक्तपित्तनाशक.

**खनिज० सौराष्ट्री** ( ध. ३.१०६; पृ. ११६ ) तुरटी.

–**भक्षण**–न., **मृत्तिकाभक्षणम् पाण्डुरोगस्य पूर्वरूपेषु मृद्भक्षणेच्छा दृश्यते** ( सुउ. ४४.५ ) **मृद्भक्षणेन जाताः रोगाः पाण्डुच्छर्दिश्वयथुश्वासकासातिसार-जन्तवः मूर्च्छाग्निसदनस्तन्यद्वेषाङ्गरुग्भ्रमाः च** ( असंउ. १ )

माती खाणे. यामुळे पांडुरोग होतो. पांडुरोगाच्या पूर्वरूपात माती खाण्याची इच्छा दिसते. माती खाल्ल्यामुळे पांडु, ओकारी, सूज, श्वास, खोकला, अतिसार, कृमि, मूर्च्छा, अग्निमांद्य, स्तनपानाचा तिटकारा, वेदना, भ्रम हे रोग होतात.

–**भाजन**–न., **मृत्तिकापात्रम्** ( चक. ७.२४ ) मातीचे भांडे.

–**भृष्टलोष्टनिर्वापित**–वि., **अग्निना भृष्टो मृत्खण्डो यस्मिन्निर्वापितः, तादृक् जलं, तृष्णाच्छर्दति-योगप्रशमनानां श्रेष्ठम्** ( चसू. २५.४० )

मातीचे ढेकूळ गरम करून ते पाण्यात टाकलेले पाणी तहान, ओकारी, अति प्रमाणात असली तर ती नाहीशी करण्यात श्रेष्ठ.

–**भृष्टलोष्टप्रसाद्**–पु., **मृद्भृष्टलोष्टनिक्षेपणेन प्राप्तो जलप्रसादो नाम जलनैर्मल्यम्** ( असंसू. १३ )

भाजलेल्या मातीचे ढेकूळ विझवलेले पाणी. निर्मळ पाणी.

( **मृत्** )–**कपाल**–न., **खर्परम्, शोणितस्थापनगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१८ )

खापर, मडक्याचा तुकडा. रक्तस्राव थांबविणाऱ्या औषधीवर्गात आहे.

–**कर्मसंपन्न**–वि., **मृदा भित्तिलेपनं यत्र सम्यक्कृतं तत्** ( चसू. १४.४६ )

मातीने चांगल्या रीतीने लिंपलेल्या भिंती आहेत असे वर्तुलाकार गृह.

–**कुब्जा**–स्त्री., **तिलवातामादीनां दृषदि पिष्टानामुष्णो-दकमृदिता पिण्डा 'उत्कारिका' इत्यन्ये** ( चचि. १५.२२७ )

तीळ, बदाम, इत्यादी पाट्यावर वाटून ऊन पाणी घालून केलेली थापटी किंवा गोळा.

**–पिण्डी**–स्त्री., **लोष्टम्** ( असंसू. ३.८ ) ढेकूळ.

**( मृन् )–मयपात्र**–न., **मृद्विकारभूतं पात्रम्** ( असंउ. ६ ) मातीचे भांडे.

**( मृल् )–लेपन**–न., **मृदा लेपनम्** ( असंसू. ३३.८ ) मातीचा लेप.

**मृदङ्ग**–पु., **वाद्य०** ( सुशा. ४.७३ ) मृदंग–वाद्यविशेष.

**मृदङ्गफल**–न., **कोशातकी** (चक.६.३) दोडके. घोसाळे.

**मृदङ्गफलिका**–स्त्री., **कोशातकी** (ध. १.१९२; पृ. ४६) घोसाळे, दोडके.

**मृदित**–न., **गुह्यरोग० शूकजन्यरोगेष्वेकः शूकपाकानन्तरं पीडितं मेढ्रं वातकोपतः सशोफं भवति** ( सुनि. १४.७; असंउ. ३८ )
गुह्यरोगाचे नाव. लिंग मोठे करण्याच्या उपचारांनी होणाऱ्या रोगातील एक. वातामुळे पीडित शिश्न सुजते.

**लक्षण० पार्श्वावमोटितम्** ( चनि.१.२१ )
कंबर, बरगड्या इ० बाजूला मुडपल्यासारखे दुखणे. पिरगळल्यासारखे दुखणे.

**–चिकित्सा**–स्त्री., **मृदितनाम्नः शूकरोगविशेषस्य चिकित्सा। ईषदुष्णेन बलातैलेन परिषेचनं कार्यम्। मधुरै: घृतस्निग्धैरुपनाहैर्मृदितमुपनाहयेत्। मधुराणि काकोल्यादीन्यश्नीयात्** ( सुचि. २१.८ )
मृदितरोगाची चिकित्सा–कोमट बलातेलाने सिंचन करावे, गोड व तूप घालून पोटीस करून बांधावे, (शेकावे), गोड अशा काकोली इ० वनस्पती पोटात घ्याव्या.

वि., **मर्दिताङ्गः** ( अहसू. १७.१५ )
ज्याचे अंग थोडे मर्दन केले आहे असा.

**मृदु**–स्त्री., **वनस्पति० कुमारी** (रापरि. ५.१०; पृ. ३४०) कोरफड.

न., **मुण्डाख्यलोहप्रकारस्योपप्रकारः, एतत् द्रुतद्रावि चिक्कणमविस्फोटं मृदु च; मुण्डं त्रिविधमुच्यते, मृदु कुण्ठं कडारं च** ( र. ५.७४ )
मुंड लोहाचा एक उपप्रकार. हे लवकर पातळ होणारे चिक्कण, फोड नसलेले, मऊ. त्याचे तीन प्रकार. वर आहेत.

**सीसकम्** ( रा. १३.२१ ) शिसे.

वि., **सुसह्यम्, अल्पबलम्, कोमलम्, सुकुमारम्, अतीक्ष्णम्** ( चक. १२.६८; चनि. १.१२ (४); चक. १२.१०४; सुचि. २४.१३; सुसू. १५.२१; सुशा. ५.४०; चक. १२.५६; सुसू. ३२.३; सुसू. ३९. ११; सुउ. ३९.९८ )
सुसह्य, अल्पबल वगैरे शब्द हे मृदूचेच अर्थ दाखवणारे शब्द आहेत.

पु., **गुण० कठिनविपरीतः, तोयाकाशगुणभूयिष्ठस्त्वगिन्द्रियग्राह्यगुणः** (चशा.६.१०; सुसू. ४१.११)
**श्लथने शक्तिः** ( अहसू. १.१८; सुसू. ४६.५१८ )
मऊपणा. एक गुण. कठिण या गुणाच्या विपरीत. जल, आकाश, महाभूत गुणाचे आधिक्य असलेला त्वचेने समजणारा गुण. ह्या गुणामुळे ढिलेपणा येतो.

**(मृद्वी)**–स्त्री., **द्राक्षा, मृद्वीका** (रा. ११.७७; पृ. १८०) द्राक्ष, मनुका.

**–कर्मन्**–न., **मृद्वीकरणम्, तच्च मधुरस्निग्धकोष्णलवणैरन्तर्बहिश्च क्रियमाणैर्लेपादिभिः। व्रणस्य षष्ट्युपक्रमेष्वेकः** ( सुचि. १.८ )
मऊ करणे. व्रणाच्या साठ उपक्रमांपैकी एक. गोड, स्निग्ध, कोमट, खारट, अशा द्रव्यांचा अंतर्बाह्य उपयोग केल्याने शरीर मृदु होते. अशा लेपांनी व्रण मऊ करणे.

**–कील**–वि., **शिथिलबन्धनम्** ( सुसू. ७.१९ )
यंत्रामधील खिळा सैल किंवा मऊ असणे.

**–कोष्ठ**–वि., **स्वल्पौषधविरेचनयोग्यो मृदुवीर्यौषधविरेचनयोग्यो वा** (सुसू. ३९.१३) **प्रायेण बहुपित्तः** ( चसू. १३.७ )
मृदुकोष्ठ; अगदी थोड्या तसेच सौम्य वीर्याच्या विरेचक औषधाने शौचाला होणारा. प्रायःपित्ताधिक प्रकृतीचा मनुष्य.

**–क्षार**–पु., **त्रिविधक्षारेष्वेकः** ( सुसू. ११.११ )
तीन क्षारांपैकी एक.

**–ग्रन्थि**–पु.,**वनस्पति०मञ्जरः** (रापरि.८.५२; पृ.३६१)
स्निग्ध पानांचे मउ गाठींनी युक्त चांगले गवत.

**–च्छद**–पु.,**वनस्पति०नलः**(रा.८.२२२;पृ.१६२) नळ.
**फोण्डालुः** ( रापरि. ७.३०; पृ. ३४९ )
एक कंद. लाल पानांचा लाल आलु.
**श्रीतालः** ( रा. ९.९५; पृ. १८२ ) ताड.

**–( च्छदा )**–स्त्री., **वनस्पति० शिलिपिका** ( रापरि. ८.४९; पृ. ३६१ )
मऊ पानांची जमिनीवर होणारी वनस्पती.

**–ज्वर**–पु., **रोग० सौम्यज्वरः** ( चचि. १३.३८ )
कमी ताप; सौम्य ताप.

**–दर्भ**–पु., वनस्पति० दर्भः ( कुशः ) ( ध. ४.१३३; पृ. १६१ ) दर्भाचा एक प्रकार.

**–पत्र**–पु., वनस्पति० नलः (रा.८.२२२;पृ.१६२) नळ. भूर्जः ( रापरि. ९.२३; पृ. ३६५ ) मऊ भूर्जपत्र.

**–पत्री**–स्त्री., वनस्पति० शाक० चिल्ली ( रापरि. ७.६६; पृ. ३५३ ) चिली. चील.

**–पर्वक**–पु., वेत्रः ( रापरि. ७.१४; पृ. ३४८ ) वेत.

**–पाक**–पु., स्तोकाग्निसंयोगसाध्यः पाकः ( चसू. २७.२७५; सुचि. ३१.११ ) थोड्या अग्नीच्या संयोगाने पक्व होणारे (शिजणारे).

**–पाश**–वि., तनुपाशम् ( यन्त्रम् ) ( सुसू. ७.१९ ) यंत्राचा प्रकार. मऊ फासा; मऊ बंधन.

**–पुष्प**–पु.,शिरीषः (ध.११२;पृ.१९२) शिरसाचे झाड.

**–पुष्पक**–पु., शिरीषः ( रा. ९.१८८; पृ. १९२ ) शिरसाचे झाड.

**–फल**–पु., करीरः ( ध. ५.९९; पृ. १८९ ) नेवती. नारिकेल० मधुनारिकेलकः (रा. ११.११०;पृ.१८४) मोहाचा नारळ.
विकण्टकः ( रापरि. ११.१९; पृ. ३७४ ) गाठाळ मऊ फळाचा गोड काट्याचा ढग येण्याच्या दिवसात फळे येणारा वृक्ष.
विकङ्कतः (ध. ५.४३; पृ. १७७) बेहळी, बेहकळ.

**–भृष्ट**–वि,, अल्पभर्जितम् ( सुसू. ४४.३८ ) थोडेसे भाजलेले.

**–मांस**–वि., कोमलमांसम् ( अहृसू. २८.२ ) नाजूक मांस.

**–मुख**–वि., यन्त्रदोष० शल्यपीडनासहमुखम् ( सुसू. ७.१९ ) शल्य नीट पकडू किंवा दाबू न शकणाऱ्या तोंडाचे यंत्र.

**–लता**–स्त्री.,वनस्पति०शूली (रापरि.८.६८;पृ.३६३) शूलासारख्या पानांची, शाखाहीन, पाण्याच्या काठी होणारी बुळबुळीत मऊ वेल.

**–वहा**–वि., मन्दवहा ( चसू. २७.२११ ) संथ प्रवाहाची ( नदी ).

**–विवृत**–वि., अगम्भीरम् ( मनः) चवि. ८.९४ ) उथळ मन.

**–वीर्य**–वि., अतीक्ष्णवीर्यम् ( सुशा. १०.६७ ) सौम्य वीर्याचे. सौम्य शक्तीचे.

**–संमत**–वि., मृदुरिति संमतः ( चसू. १८.३८ ) सौम्य ( मऊ ) आहे असे मान्यता पावलेले,



**–संशोधन**–न., अतीक्ष्णं विरेचनम् ( अहृसू. १३.१) मृदु विरेचन, हलके रेचक.

**–सार**–न., वनस्पति० तूलम् (रा. ९.८७; पृ. १८१) तुतीचे फळ, सैतूत ( खानदेशातील नाव ).

**मृद्दारशृङ्ग**–न., बोदारशृङ्गम् (र.,३.१३४) मुरदाडशिंग.

**मृद्दारशृङ्गक**–न., उपरस० बोदारशृङ्गकम् ( धपरि. ६.२३; पृ. २९२ ) मुरदाडशिंग.

**मृद्वग्नि**–पु., तैलसाधनार्थं प्रयुक्तो नातितीव्रो वह्निः (चचि.३.२५८)मंदाग्नि, तेल सिद्ध करण्यास उपयुक्त.

**मृद्वग्निता**–स्त्री., अग्नेरल्पबलत्वम् ( चनि. १.२७ ) अग्नीची अल्प शक्ति.

**मृद्वीका**–स्त्री., शुष्का कपिला द्राक्षा ( ध., ५.५८; पृ. १७९ ) काकोल्यादिगणे एकं द्रव्यम् ( सुसू. ३८.३५ ) स्नेहोपगगणे एकं द्रव्यम् ( चसू. ४.१३ ) अस्या उदकं सशर्करं पित्तशूल-शमनं भवति ( सुउ. ४२.१०८ ) वातहराऽपि कोष्ठे वातकृत्त्वं स्वभावसिद्धम् अस्याः ( असंसू. ७.२४० ) रसाद्यैस्तुल्याऽपि मधुकस्य च मृद्वीकाऽतिशायिद्रव्यस्वभावयोगाद्विरेचनी भवति ( असंसू. १७.४६ ) फलानामग्र्या. ( चसू. २५.३८ ) गुणाः–मधुरा शीतला स्निग्धा बृंहणी वृष्या तृष्णादाहज्वरश्वासरक्तपित्तक्षत-क्षयवातपित्तोदावर्तस्वरभेदमदात्ययतिक्तास्यता-ऽऽस्यशोषकासनाशिनी च ( चसू. २७.१२६ ) मृद्वीका श्वेता च द्राक्षा काश्मीरभवा ज्ञेया। सा बीजविवर्जिता मृद्वीका प्रोच्यते ( चचि. २४.१८० ) काळी द्राक्षे, मनुका. कावळी इत्यादी गणात स्नेहाच्या कार्याला उपकारक गणात आहे. मनुकांचे पाणी साखर घालून पित्तशामक. वातहर असून कोठ्यात वात वाढविते. ज्येष्ठमध व मनूक रसवीर्यादिकांनी समान असून ही ती रेचक स्वभावाने ज्येष्ठमधा-पेक्षा भिन्न आहे. फळांत श्रेष्ठ. गुण–गोड, थंड, स्निग्ध, पौष्टिक, शुक्राला हितकर, तहान, दाह, ज्वर, श्वास, रक्तपित्त, छातीतले क्षत, क्षय, वात, पित्त, उलटे पोट फुगणे, आवाज बिघडणे, मद्यपान-जन्य विकार, तोंड कडू असणे, तोंड सुकणे व खोकला नाशक. पांढरी द्राक्षे काश्मीरमध्ये होतात. ती बी विरहित होतात.

**मृद्वीकेक्षुरसासव**–पु., आसुत० मृद्वीकेक्षुरसाभ्यां मिलित्वा कृत आसवः माध्वीकसमो गुणैः,

**कफघ्नः मृद्वीकेक्षुरसासवोऽप्येवम्, परं नात्युष्णः** ( चसू. २७.१८८; असंसू. ६.१३२ )
द्राक्षे व उसाचा रस यांच्या मिश्रणाचे आसव. कफ नाशक आहे. अति उष्ण नाही. मोहाच्या आसवासारख्या गुणांचे.

**मृष्ट**–वि., **निर्मलम्** ( चचि. ८.१३६ ) **वदनप्रियम्** ( चसू. २७.१९८ ) मल नसलेले, रुचकर.

**मृष्टक**–न., **वनस्पति० राजिका** ( चसू. २७.१७० ) मोहरी.

**मेखला**–स्त्री., **क्षुद्रसुवर्णघण्टिकायुक्तः कटिदोरकः** ( सुउ. ४७.६४ )
कंबरेला बांधलेली सोन्याच्या बारीक घागऱ्या असलेली साखळी.
**वनस्पति० पृश्निपर्णी** (रा. ४.११७ पृ.२४) पिठवण.

**मेघ**–पु., **वनस्पति० मुस्ता** (ध.१.४०पृ.१५) नागरमोथा.

**( मेघा )**–स्त्री., **वनस्पति० मुस्ता** ( रा. ६.५८ पृ. १५) नागरमोथा.

**–नाद**–पु., **शाक० तण्डुलीयकः** ( र. १८.२१२; र. १२.२१; ध. ४.११६ पृ. १५७ ) तांदुळजा.

**–( नादी )**–स्त्री., **तण्डुलीयकः** ( र. २५.१२१ ) तांदुळजा.

**–नादरस**–पु., **वातादिज्वरघ्नो योग०, समगन्धपारदपादांशं कांस्यपित्तलताम्रभस्मभिः साकं तण्डुलीयरसेन मर्दयित्वा एकमेवपुटं दत्वा अयं क्रियते । अयं रसोऽनिलादिज्वरेषु माषप्रमाणेन दातव्यः** ( र. १२.२१ )
मेघनादरस नावाचे सिद्धौषध. पारा, गंधक, समभाग चतुर्थांश कासे, पितळ, तांबे यांचे भस्म एकत्र तांदुळजाच्या रसाने खलून एकाच पुटाने करितात. असा हा तयार झालेला मेघनादरस वातादि ज्वर नाशनासाठी एक मासा प्रमाणाने द्यावा.

**–पुष्प**–पु., **वनस्पति० वेतसः** (ध.५.११७;पृ. १९३) वेत.

**–प्रसव**–न., **जलम्** ( रा. १४.३१८; पृ. २५८ ) जल. पाणी.

**–मोदिनी**–स्त्री., **वनस्पति० जम्बूः** ( रा. ११,१२८; पृ. १८६) जांभूळ.

**–राव**–पु., **मेघनादः। अम्बुचारिपक्षि०** (चसू.२७.४३) मेघगर्जना, चातकपक्षी,
**चातकः । मेघरावः संघातचारिप्लवेष्वेकः** ( सुसू. ४६.१०५-१०६ )
चातक पक्षी. टोळीने आकाशात संचार करणारा पक्षी.

**–सार**–पु., **भेषजद्रव्य० चीनकर्पूरः** ( रा. १२.६३; पृ.१०१ ) चिनी कापूर.

**–स्तनितोद्भव**–पु., **वनस्पति० विकण्टकः** ( रापरि. ११.२०; पृ. ३४७ )
गाठाळ, मऊ फळांचा, गोड काट्यांचा, मेघ येण्याच्या सुमारास फळे येणारा वृक्ष.

**मेघागमप्रिय**–पु., **वनस्पति० कदम्ब० धाराकदम्बः** ( रा. ९.१७२; पृ. १९० ) कळंब.

**मेचक**–पु., **वर्ण० कृष्णस्य वस्त्रादेः ससारगन्धकादिभिर्मसृणीकृतस्य यो वर्णः, सः** ( चचि. ४.१२ ) **श्यामलवर्णः** ( सुनि. ६.२६ )
काळ्या वस्त्राला काथ, गंधक इत्यादींनी चिकण व काळसर असा जो रंग देतात तो.
न,, **अञ्जनम्** ( ध. ३.१५१; पृ. १२५ ) काजळ.

**( मेचका )**–स्त्री., **वायुरोगदा वायवी लूता । इयमुन्दिदा वर्तते** ( असंउ. ४४ ) **दंशलक्षणानि–दंशमध्ये जतुकणोपमा पिटका ज्वरः शोफश्च जायते** ( असंउ. ४५ )
मेचका नावाची लूत. ही जमिनीत होते. ही चावल्याने दंशाचे ठिकाणी लाखेच्या कणासारख्या पुळ्या, ताप, सूज ही होतात.

**मेचकाभ**–वि., **स्निग्धकृष्णम्** ( चचि. १९.९ ) काजळासारखे काळे, स्निग्ध काळे.

**मेचकाभिधा**–स्त्री., **वनस्पति० वत्सादनी** (रापरि.३.३२; पृ. ३३२ ) वासनवेल ( पाताल गारुडी).

**मेढ्र**–पु., **पशु० उरभ्रः, 'मेंढा' इति लोके** ( र. १०.९७ ) मेंढा.
न., **शारीर० उपस्थम्, शेफः तच्च षडङ्गुलदीर्घं पञ्चाङ्गुलपरिणाहं च** ( चवि. ८.११७ ) **बहिर्मुखस्रोतोविशेषः** ( सुशा. ५.१० ) **ग्रीवाहृदयनिबन्धिनीनामधोभागगतानां कण्डराणां मेढ्रमग्रप्ररोहः** ( सुशा. ५.११ ) **मूत्रवेगरोधान्मेढ्रवेदना जायते** ( अहृसू. ४.४ )
शिश्न; पुरुषांचा शरीराबाहेर मूत्र व शुक्र सोडण्याचा मार्ग; साधारण लांबी–सहा अंगुळे व पाच अंगुळे घेराचा. हृदय बांधणाऱ्या पेशीच्या खाली गेलेल्या कंडरांचा टोकाचा भाग. लघ्वी अडविली तर शिश्नात वेदना होतात.

**–पाक**–पु., रोग० रक्तप्रदोषजविकारेष्वेकः ( चसू. २८.१२, सुसू. २४.९ ) चत्वारिंशत्पित्तविकारेष्वेकः ( चसू. २०.१४ )
शिश्नाचा भाग पिकणे. चाळीस पित्तरोगांतील एक. रक्तदोषजन्य विकारांतील एक.

**–प्रमर्द**–पु., लक्षण० मेढ्रस्य प्रकर्षेण मर्दनम् ( सुनि. ३.१० ) शिश्न सारखे किंवा जोराने हाताने मळणे.

**–रोग**–पु., शिश्नरोगः ( सुचि. २६.१२ )
शिश्नाचे रोग.

**–शुद्धि**–स्त्री., मेढ्रशोधनम् ( अहसू. २५.३९ )
शिश्नशुद्धी.

**मेण्ढ्र**–न., मेढ्रम् (असंशा. ५.८१; ९.१६; ८.३०) शिश्न.

**–पाक**–पु., लक्षण० शेफसः पाकः (असंसू. २०.१४)
शिश्नपाक; लिंग पिकणे.

**–स्तम्भ**–पु., लक्षण० शेफसः स्तब्धता ( असंसू. २०.१३ ) शिश्न ताठणे.

**मेथा**–स्त्री., वनस्पति० वनमेथिका, द्र० 'मेथिका' ( रा. ५.१८५ ) रानमेथी.

**मेथिका**–स्त्री., वनस्पति० शाकभेदः, 'वातपित्तहरा तिक्ता लघ्वी श्लेष्माविरोधिनी' मेथिका तत्समं किञ्चिद् हिस्फित्थं पुष्टिदं गुरु ( ड. सुसू. ४६.२५६ ) मेथिका कटुरुष्णा दीप्तिकरी रक्तपित्तप्रकोपनी वातप्रणाशिन्यरोचकहरा च (ध. ६.११२) अहित्यस्तु वनमेथिका, मेथिकासदृशः परन्तु तदल्पगुणः ( ध. ६.११३ ) अश्वबला तुरुष्कदेशे बृहत्पत्रा मेथिकाभेद एव । 'हिस्फित्थ' इति लोके । मेथिकाहिस्फित्थयोर्गुणसादृश्यमस्ति । वनमेथिका वाजिनां बल्या, तेषामर्थे एव विशेषेण पूजिता ( भा. प्र. )
हिं.—मेथी .
**म.—मेथी.**
गु.—मेथी.
बं.—मेथी.
त.—वेन्दायाम.
फा.—शामलिता.
मेथी. एक भाजी. **गुण**—कडु, तिखट, उष्ण, अग्निदीपक, रक्तपित्तप्रकोपक, वातनाशक, बेचवपणा नाहीसा करते. वातपित्तहर, कफ न करणारी. मोठी मेथी (हिस्फित्थ हे एक नाव)– पौष्टिक, जड; हिला अश्वबला म्हणतात. पाने मोठी असतात. रानमेथी घोड्यांना बलवर्धक.

**मेथिनी**–स्त्री., वनस्पति० मेथिकाभेदः वनमेथिका, द्र० 'मेथिका' ( रा. ५.१८४ ) मेथीचा एक प्रकार.

**मेथी**–स्त्री., वनस्पति० वनमेथिका, इयं शाकत्वेन उपयुज्यते ( रा. ५.१८४; पृ. २३१ )
मेथी, रानमेथी. हिचा भाजी म्हणून उपयोग करतात.

**मेदक**–पु., जगलः, सुरादीनामधःस्थितो घनो भागः ( चनि. २.४; चचि. ७.९०; चक. १.१२ ) श्वेतसुरा जगलाख्या ( चसू. २५.४९ )
मद्यम् ( ध. ६.२५६; पृ. २५१)
मद्य. सुरादि पदार्थांच्या तळाचे भागात साठणारा गाळ– जगल. पांढरी दारू.

**मेदज**–पु., गुग्गुल० ( रा. १२.१८८ ) गुग्गुळ.

**मेदस्**–न., शारीर० रसादिसप्तधातुष्वेकः ( चसू. २६.४३ (५) ) मांसात् परिणतो धातुः । स्नेहनं कार्यं करोति ( सुसू. १५.५(१); सुसू. १४.१० ) प्रकृतिस्थस्य मेदसः प्राकृतं कर्म– स्नेह–स्वेदौ दृढत्वं पुष्टिमस्थ्नां च । शरीरे मेदसः प्रमाणं द्वावञ्जली ( चशा. ७.१५ ) अण्वस्थिषु मेदः स्थूलास्थिषु तु विशेषेणाभ्यन्तरस्थितः षितो रक्तश्च मज्जा वर्तते, इतरेषु सर्वेषु सरक्तं मेद उच्यते ( सुशा. ४.१३ ) मेदःक्षयलक्षणम्–कट्याः स्वपनं प्लीह्नोर्वृद्धिः कृशाङ्गता, संधिशून्यता, रौक्ष्यं मेदुरमांसप्रार्थना च ( सुसू. १५.९; अहसू. ११.१८; असंसू. १९.१० ) मेदोवृद्धिलक्षणम्–अल्पे चेष्टिते श्रमः श्वासश्च तथैव स्फिक्स्तनोदरलम्बनं च, मांसवृद्धिलक्षणानि च भवन्ति ( असंसू. ११.१०; असंसू. २४.२३ ) आमरसवदतिस्निग्धमसम्यक्परिणतं मेदः प्रमेहाञ्जनयति ( सुनि. ६.४ ) मेदःक्षीणो नरः मेदःसिद्धानि मांसानि ग्राम्यानूपौदकानि च सक्षाराणि च विशेषेणाभिकाङ्क्षति ( सुसू. १५.२९-३१ )
मेद; चरबी. रसादि सप्तधातूंपैकी एक धातु. मांसापासून झालेला. शरीर स्निग्ध राखणे हे या धातूचे मुख्य काम. त्याशिवाय घाम निर्माण करणे, शरिराला घट्टपणा आणणे, बल देणे, अस्थिधातु स्थिर आणि घट्ट ठेवणे. मेदाचे प्रमाण २ अंजली आहे.

सूक्ष्म अस्थीमध्ये मेद असतो आणि मोठ्या हाडातून विशेषतः मज्जा असते. इतर ठिकाणी सर्वत्र रक्तासह मेद असतो.

**मेदक्षयाची लक्षणे**–कमर बधिर होणे, प्लीहा वाढणे, अंग कृश होणे, सांधे पोकळ झाल्यासारखे वाटणे, रूक्षता, आणि चरबीयुक्त प्राण्यांचे मांस खाण्याची इच्छा.

**मेदोवृद्धिलक्षणे**–थोड्याही हालचालीने थकवा व श्वास. तसेच ढुंगण, स्तन, वपोट लोंबणे ब मांसवृद्धीची लक्षणे होतात. अपक्वरसाप्रमाणेच अति स्निग्ध आणि नीट पचन न झालेला मेद प्रमेह निर्माण करतो.

मेद क्षीण झालेला मनुष्य विशेषेकरून चरबीयुक्त मांस, ग्राम्य आणि पाणथळ प्रदेशात राहाणाऱ्या प्राण्यांचे मांस, क्षारयुक्त खाण्याची इच्छा करतो. **जांगमद्रव्य० सामान्यगुणाः—वातघ्नं बलपित्तकफप्रदं वसामज्ज्ञोः सदृशस्वरूपं च** ( अहसू. ५.६१) **ग्राम्यानूपौदकानां च वसामेदोमज्जानो गुरूष्णमधुरा वातघ्नाः जाङ्गलैकशफक्रव्यादादीनां लघुशीतकषायाः रक्तपित्तघ्नाः प्रतुदविष्किराणां श्लेष्मघ्नाः। तत्र घृततैलवसामेदोमज्जानो यथोत्तरं गुरुविपाका वातहराश्च** ( सुसू. ४५.१३१ )

एक प्राणिज द्रव्य. गुण–वसा व मज्जा यांचे स्वरूप सारखे, वातघ्न, बल-कफ–पित्त वाढविणारी. गावात राहाणाऱ्या प्राण्याची, पाण्यात व पाणी मुबलक असलेल्या भागात रहाणाऱ्या प्राण्याची वसा मेद व मज्जा ही जड, उष्ण, गोड, वातघ्न. पाणी कमी असलेल्या भागातील प्राणी, एक खूर असलेले व वाघ इ० मांसाहारी प्राणी यांचे वसा इत्यादी पदार्थ, हलके–थंड– तुरट– रक्तपित्त नाशक. वेचून व टोचून टोचून भक्ष्य खाणाऱ्यांची वसा इत्यादी कफघ्न. तूप, तेल, वसा, मेद, व मज्जा यात उत्तरोत्तर वातहर व जडविपाक होणारे आहेत.

**–क्षीण**–वि., **क्षीणमेदोधातुमान् (नरः)** ( सुसू. १५.२९-३१ ) द्र० **'मेदस्'**
मेदधातु क्षीण असणारा.

**–पुच्छ**–पु., **ग्राम्यपशु० एडकः, मांसगुणाः– वृष्यं मेषसदृशम्** ( सुसू. ४६.८८ ) **दुम्बक इति प्रसिद्धः** ( ड. सुसू. ४६.८८ )
एडका. शुक्राला हितकर. मेंढ्यासारख्या गुणांचा.

**–संश्रय**–वि., **अतिस्थूलः** ( चक्र. चसू. २८.१५ )
अतिशय लठ्ठ.

**–सार**–वि., **यस्मिन् मेदोधातुः सारत्वेन वर्तते, तादृशः पुरुष० वर्णस्वरनेत्रकेशलोमनखदन्तौष्ठमूत्रपुरीषेषु विशेषतः स्नेहवान्। सा सारता वित्तैश्वर्यसुखोपभोगप्रदानान्यार्जवं सुकुमारोपचारतां चाचष्टे** ( चवि. ८.१०६ ) **बृहच्छरीरः स्निग्धमूत्रस्वेदस्वरआयासासहिष्णुश्च** ( सुसू. ३५.१६ )

**मेदधातुसारवान पुरुषाचे लक्षण**—वर्ण, स्वर, नेत्र, केश, लोम, नख, दन्त, ओष्ठ, मूत्र, पुरीष ही स्निग्ध असतात. या सारतेमुळे पुरुष वित्त, ऐश्वर्य, सुखोपभोग इत्यादींचा उपभोग मोठ्या आस्थेने आणि सुयोग्य तऱ्हेने घेतो. मोठे शरीर, त्याला श्रम सहन करण्याची ताकत नसते.

**–सारा**–स्त्री., **वनस्पति० मेदा**
(रा. ५.१६१; पृ. ३१) मेदा. अष्टवर्गापैकी एक.

**–स्थ**–वि., **मेदोधातुगतः** (चचि.३.७९) मेदोधातुगत.

**( मेदो )–ग्रन्थि**–पु., **रोग० मेदोजग्रन्थिः, प्रवृद्धमेदो वायुना मांसेऽथवा त्वचि नीतं ग्रन्थिं कुरुते। लक्षणानि–शरीरवृद्धिक्षयवृद्धिहानिः स्निग्धो महान् कण्डूयुतोऽरुजो ग्रन्थिर्भवति। भिन्नं पिण्याकसर्पिःप्रतिमं मेदः स्रवति**
( सुनि. ११.७; र. २४.१२६ )
मेदाची गाठ. शरिरात वाढलेला मेद वायूच्या साह्याने मांसाकडे अथवा त्वचेकडे नेला जाऊन गाठ होते. लक्षणे– शरीर वाढले की गाठही मोठी होते व शरीर कृश झाले की लहान होते. गाठ स्निग्ध, मोठी, खाजयुक्त, पण पीडा नसलेली अशी असते. ही गाठ फुटली की तिच्यातून पेंड, तूप, यांसारखा स्राव होतो.

**–दोष**–पु., **मेदोधातुदुष्टिः** ( अहसू. १५.२० )
मेदोधातुदुष्टि.

**–दोषज**–वि., **मेदोधातुदुष्टिजन्यः ( विकारः ), ग्रन्थिवृद्धिगलगण्डार्बुदमेदोजौष्ठप्रकोपमधुमेहातिस्थौल्यातिस्वेदप्रभृतयो मेदोदोषजाः ( विकाराः )**
( सुसू. २४.९ )
मेदधातूमुळे होणारे रोग. गाठी, गलगंड, अंत्रवृद्धि, अर्बुद, मधुमेह, अतिस्थौल्य, अतिस्वेद, ओठाचा विकार हे होतात.

**–द्रवा**–स्त्री., **वनस्पति० मेदा** (रा. ५.१६१; पृ. ३१)
मेदा.

**–धरा**–स्त्री., कला० **तृतीया मेदोधरा नाम, मेदो हि तस्यामुदरेऽण्वस्थिषु च सरक्तं भवति तदेव च**

**शिरसि कपालप्रतिच्छन्नं मस्तिष्काख्यं मस्तुलुङ्गाख्यं च, स्थूलास्थिषु च मज्जा** ( असंशा. ५.३७; ( सुशा. ४.१२ )

मेदोधरा कला. तिसरी कला आहे. मेद, हा त्या कलेत, उदरात व बारीक हाडात रक्तासह असतो; तोच डोक्यात कवटीने झाकलेला मस्तिष्क मस्तुलुंग ( मेंदु ) नावाने आहे व मोठ्या हाडात मज्जा म्हणून आहे.

**–युतानिल**–पु., **मेदावृतो वातः** ( डल्हणः; सुचि. ५.३० ) मेदाने आवृत वायु.

**–रोग**–पु , रोग० **मेदोधातुदुष्टिजन्यरोगः** (मा.) मेदोधातुदुष्टिजन्य रोग.

**–वर्ति**–स्त्री., शारीर० **अतीव तरलं स्तरचतुष्टयात्मकमान्त्राच्छादनं वपानाम्ना प्रसिद्धम्** ( सुचि. २.४५ )

वपा नावाचे आतड्यावरील अत्यंत पातळ आच्छादन. याचे चार स्तर– पापुद्रे असतात.

**–वहस्रोतस्**–न., शारीर० **मेदोवहे द्वे स्रोतसी तयोर्मूलं कटी वृक्कौ च, तत्र विद्धस्य स्वेदागमनं स्निग्धाङ्गता तालुशोषः स्थूलशोफता पिपासा च** ( सुशा. ९.१२ ) **मेदोवहानां स्रोतसां बुक्कौ ( वृक्कौ ) मूलं वपावहनं च** (चवि. ५.१६ ) **अव्यायामाद् दिवास्वप्नान्मेद्यानामतिभक्षणाद् वारुण्याश्चातिसेवनान् मेदोवाहीनि स्रोतांसि दुष्यन्ति** (चवि. ५.१६)

मेदोवह स्रोतस, ही दोन. त्यांचे मूळ कटि म्हणजे पक्वाधान ( मलाशय ) व वृक्क. तेथे ही दुखावली, कापली गेली तर घाम येतो, स्निग्ध अंग होते, टाळू सुकते, तहान व जाड सूज येते. यांचे मूळ वृक्क, वपावहन. व्यायाम न केल्याने दिवसा झोप, मेद खूप असलेले मांस व मेदवृद्धिकर आहार खाणे, वारुणी (दारू) अति पिणे यांनी मेदोवह स्रोतसांची दुष्टि होते.

**–वहा–(सिरा)**स्त्री., शारीर० **मेदोधातुवहनार्थं सिरा यत्रस्थो दोषः अन्येद्युष्कं ज्वरं करोति** (चचि.३.६३-६४)

मेदोवाहक सिरा, हिच्यातील ज्वरकर दोष दररोज एकदा येणारा ज्वर करतो.

**–वाहिस्रोतस्**–न., **मेदोवहस्रोतः** ( चवि. ५.१६ ) मेदोवाही स्रोतस.

**–वृद्धि**–स्त्री., रोग० **मेदोजमुष्कवृद्धिरोगभेदः, लक्षणम्– इयं मृदुः स्निग्धा कण्डूमत्यल्पवेदना तालफलवर्णा च भवति** ( सुनि. १२.६ )

मेदापासून झालेली वृषणवृद्धि. ही मऊ, स्निग्ध, खाजयुक्त, अतीशय कमी वेदना, व ताडाच्या फळाच्या वर्णासारखी असते.

**मेदा**–स्त्री., वनस्पति० **शुक्रजननगणे, स्नेहोपगगणे जीवनीयगणे चैकं द्रव्यम्** ( चसू. ४.९-१३ ) **जीवनीयपञ्चमूलेष्वेकं द्रव्यम्** ( चचि. १.४४ ) **मेदा महामेदा चेति मेदाद्वयं जीवनीयगणे वर्तते** ( असंसू. १५.६ ) गुणाः– **स्वादुः शीता क्षयदाहज्वरापहा पित्तघ्नी कफवर्धिनी च । महामेदा शीता स्वादुः कफपित्तविवर्धिनी दाहास्रपित्तक्षयवातज्वरान् हन्ति** ( ध. १२८-१२९; पृ. ३० ) **वातदोषकरी, महामेदा तु लताजातः कन्दः, तद्गुणाः–शीतारुच्या कफशुक्रप्रबुद्धिकृत् दाहास्रपित्तक्षयवातज्वरघ्नी च** ( रा. ५. १६२,१६४; पृ. ३१ )

मेदा शुक्रजनक, स्नेहकार्योपकारक, जीवन वाढविणारा वर्ग, व जीवनीय पंचमूळ यांत हे द्रव्य आहे. **गुण**—गोड, थंड, क्षय, दाह, ज्वर, पित्त नाशक, कफवर्धक.

महामेदा– थंड, गोड, कफपित्तवर्धक, दाह, रक्तपित्त, क्षय, वातज्वर नाशक, लतेचा कंद. थंड, रुचकर, कफ व शुक्र व बुद्धीची वाढ करणारा, दाह, रक्तपित्त, क्षय व ज्वरनाशक आहे. महामेदा हाच वेलीचा कंद होय.

**–द्वय**–न., **मेदा, महामेदा चैतद्द्वयं जीवनीयगणे प्रोक्तम्** ( अहृसू. १५.८ )

मेदा आणि महामेदा ही दोन्ही जीवनवर्धक गणात आहेत.

**मेदिनी**–स्त्री., वनस्पति० मेदा (रा.५.१६१;पृ.३१) मेदा. **काश्मरी** ( रा. ९.१४४; पृ. २९) शिवण.

**–सार**–पु., योग० **लोहताम्रभस्मनां प्रत्येकं पलत्रयं भृङ्गराजरसगोमूत्रत्रिफलाक्वाथैः पृथक् त्रिवारं संमर्द्याम्लकाञ्जिकं तस्मिन् निक्षिप्य प्रहरचतुष्टयं यावत्पचेत् । ततश्च समभागगन्धकं संमिश्र्य विंशतिवारं पुटेत् ततश्च पलमात्रं पारदं तद्द्वादशांशं वत्सनाभं सर्वैः समं च कटुत्रयं प्रक्षिप्य पेषयेत्स्थापयेच्च । मात्रा–वल्लः, अनुपानम्–घृतयुक्तं त्रिकटुचूर्णम्, फलम्–अयं सर्वेषां कुष्ठानां श्वित्रस्य हन्ता सन् गुल्मप्लीहकुक्ष्युरोगोदावर्तमहावातमन्दाग्नि-**

**तागलग्रहमहोन्मादकर्णदन्तरोगसर्पलूतादिविष-भगन्दरविद्रध्यन्त्रवृद्धिशिरःशूलान्नाशयति**
( र. २०.१२२-२९ )
एक योग. लोह, तांबे यांचे भस्म १२|१२ तोळे घेऊन त्यांना माका, गोमूत्र, त्रिफळा यांच्या निरनिराळ्या तीन तीन भावना देऊन, कांजीमध्ये १२ तास शिजवावे. नंतर समभाग गंधक घालून वीस वेळा पुटे द्यावीत. नंतर चार तोळे पारा व एक बारांश बचनाग व सर्व समान त्रिकटु घालून खल करावा व सुरक्षित ठेवावे. **प्रमाण**–१ वाल. **अनुपान**–त्रिकटुयुक्त तूप. **फळ**–हा सर्व कुष्ठ, कोड, गुल्म, प्लीहा, कुशीतले रोग, छातीचे रोग, उलटी, पोटफुगी, महावात, मंदाग्नि, गळा धरणे, मोठा उन्माद, कान, दात, यांचे रोग; सर्प, लूत यांचे विष, भगंदर, विद्रधि, अंतर्गळ, डोकेदुखी. नष्ट करतो.

**मेदुर**–वि., **मेदस्वी** ( चसि. १.३६; सुचि. १०.३; असंसू. २५.६५ )
लठ्ठ, स्थूल, शरिरात चरबी फार वाढलेला.

**( मेदुरा )**–स्त्री., **वनस्पति॰ काकोली** (रा.३.१६६;पृ.३१) कावळी.

**मेदोर्बुद**–पु., न., **रोग॰ मेदसोऽर्बुदम्** (सुचि. १८.४१) मेदाचे अर्बुद.

**मेद्य**–वि., **मेदुरम्, मेदोजनकम्** ( चचि. १५.२३३; सुनि. ६.३ ) **मेद्यो नाम स्थूलः सान्द्रः पुष्टो मेदोभवो मेद एव वा** ( चचि. ३०.८८ )
स्थूल मेद वाढविणारे मेद्य म्हणजे स्थूल, घट्ट, पुष्ट असे मांस किंवा मेदापासून केलेले द्रव्य किंवा मेदच.

**–मांसोपदंश**–पु., **मेदुरप्राणिनां मांसस्योपदंशः, उपदंशो नाम भोजनमध्ये सेव्यमानो रुचिजनको भक्ष्यविशेषः** ( असंशा. ४.२४ )
भोजनाच्या वेळी तोंडी लावण्याचा लठ्ठ प्राण्यांचा केलेला एक रुचकर पदार्थ.

**मेधा**–स्त्री., **धारणावती धीः** ( चसू. २७.३५०; सुशा. ३.३३ ) **पित्तस्य कार्यम्** (सुसू. १५.४.(२)) **सात्त्विकगुणोऽयम्** ( सुशा. १.१८ ) **मेधां ग्रन्थादिधारणेन परीक्षेत** ( चवि. ४.८ )
ज्ञान धारण करणारी बुद्धि, सात्त्विकगुण. पित्ताचे कार्य. ग्रंथादि धारण करण्याच्या सामर्थ्यावरून मेधा समजावी–परीक्षावी. हा सात्विक गुण आहे.

**–कर**–वि., **धारणाशक्तिवर्धकम्** ( अहसू. १४.२८ ) धारणशक्तिवर्धक.

**–कृत्**–पु., **वनस्पति॰ शितिवारः** (रा.४.२०७;पृ.३६) कुरडू.

**–विन्**–वि., **बुद्धिमान्** ( सुचि. २८.४ ) बुद्धिमान.

**–(विनी)**–स्त्री., **वनस्पति॰ तेजस्विनी** (रा. ३.३९४; पृ. ६१ ) मालकांगोणीप्रकार.

**मेधायुष्कामीय**–वि., **मेधायुष्काममधिकृत्य कृतः, ( अध्यायसंज्ञाविशेषः ) अध्याय॰** (सुचि. २८.१)
अध्यायाचे नाव. धारणाशक्ति व आयुष्य वाढविण्यासंबंधी उपचार यात आहेत.

**मेधावी**–स्त्री., **मद्यम्** ( रा. १४.३०२, पृ. २५४ ) मद्य.

**मेध्य**–पु., **धान्य॰ यवः** ( रा. १६.१२४; पृ.२२३) जव.
**वनस्पति॰ खदिरः** ( रा. ८.३२; पृ.१२ ) खैर.
वि., **यज्ञियम्** पु., **मेधो यज्ञः विशेषणाद् विशेष्यावगतिरिति तदर्हो मेदुरो बस्तः । तस्य स्त्यानं रक्तं घृततैलभृष्टं प्रवाहिकायां पिबेत्** ( सुउ. ४०.१४८ )
यज्ञातील बळी द्यावयाचा लठ्ठ बोकड. मेध म्हणजे यज्ञ. त्याला योग्य असा मेदस्वी बोकड; त्याचे घट्ट रक्त, तूप तेलात परतून आवरक्ताच्या हगवणीत प्यावे.
वि., **मेधाकरं, मेधाजनकम्** ( चसू. ५.९८ ) बुद्धिवर्धक.

**(मेध्या)**–स्त्री., **वनस्पति॰ केतकी** (रा. १०.१; पृ. २०४) केवडा.
**गोरोचना** ( ध. ३.२०; पृ. ९८) गोरोचन.
**ज्योतिष्मती** ( रा. ३.३९५; पृ. ६१) मालकांगोणी.
**तेजोवती** ( रा. ३.३९४; पृ. ६१ ) मालकांगोणीचा प्रकार.
**श्वेतवचा, वचा॰** ( ध. २.६; पृ. ७० ) पांढरा वेखंड.
**शङ्खपुष्पी** ( ध. ४.११३ पृ. १५६) शंखपुष्पी.
**शमी** ( रा. ८.१५२; पृ. १८८ ) शमी.

**( मेध्य )-रसायन**–न., **मेधाजनकं रसायनम्, मण्डूकपर्ण्याः स्वरसः यष्टीमधुकस्य चूर्णं क्षीरेण सह, गुडूच्या रसः शङ्खपुष्प्याः समूलपुष्प्याः कल्कः एतानि मेध्यरसायनानि रोगनाशकानि बलाग्निवर्णस्वरवर्धनानि सन्ति । शंखपुष्पी विशेषेण मेध्या** ( चचि. १.(३)३०,३१ )

बुद्धिवर्धक रसायन. उदीरकानीचा स्वरस, जेष्टमधाचे चूर्ण दुधाबरोबर, गुळवेलीचा रस, शंखपुष्पीचा फुलामुळासह गोळा, ही मेध्य रसायने, रोगनाशक आहेत. बल, अग्नि, वर्ण, स्वर वर्धक आहेत.

शंखपुष्पी विशेषबुद्धिवर्धक आहे.

**मेरु**–पु., पर्वत० **सौवर्णः पर्वतः** ( र. ५.७ )
सुवर्णपर्वत, मेरु पर्वत.

**मेलक**–वि., **धात्वादिमेलनकरः (पुरुषः)** ( र. ६.५५ )
धातु एकत्र करणारा.

**–लवण**–न., **औषरकम्** ( रा. ६.५१ पृ. ७६ )
धातु एकत्र करणारे खनिज लवण.

**मेलन**–वि., **कठिनलोहमृदुस्वर्णयोरिव परस्परविरुद्धयोः धात्वोः संमेलनकारकः** ( माक्षिकधातुः ) ( र. २.८५ )
कठिण लोह आणि मृदु सुवर्ण ह्या परस्पर विरुद्ध धातूंना एकत्र आणणारा ( सुवर्णमाक्षिक ).

**मेला**–स्त्री., वनस्पति० **महानीली** ( रा. ४.३५३ पृ.५५ )
काळ्या दाण्याचा प्रकार.

**मेष**–पु., ग्राम्यवर्गे पशु० **'मेंढा' इति लोके** ( चसू.१५.७; सुसू. ४६.८५ ) **मेषस्य मूत्राशयः बस्तियन्त्रार्थं प्रशस्तः** ( सुचि. ३७.१०७ ) **शरद्यस्य मांसमिष्टम्** (चसू. ६.४३) **मेषमांसगुणाः–वातहरं दीपनं कफपित्तलं, सर्वग्राम्यमांससदृशगुणमेव** ( ध. वर्गेतराणि १६ ) **मेषरोम्णामन्तर्धूमदग्धं भस्म क्षौद्रोपेतं हिक्काशमनार्थं लेह्यम्** ( सुउ. ५०.२० ) **मेषस्य शृङ्गमञ्जनद्रव्येषूपयुज्यते** ( असंसू. ८.९६ ) **मेषीमूत्रगुणाः–कटु तिक्तमीषत्क्षारमुष्णं वातघ्नं कासप्लीहोदरश्वासशोषवर्चोग्रहेषु हितम्** ( रा. १५.५०३; ध. ६.४९१; पृ. २८७ )
मेंढा. याचा मूत्राशय बस्तियंत्राकरिता उपयुक्त. याचे मांस शरदृतूंत चांगले. **गुण**—दीपक, वातहर, कफपित्तकर; गावात रहाणाऱ्या सर्व प्राण्यांच्या मांसाच्या गुणांसारखे. **मेंढ्याचे केस**—मडक्यात तोंड बंद करून केलेली मशेरी मधाबरोबर दिल्याने उचकी नाशक. **शिंग**—अंजनासाठी इतर द्रव्यांबरोबर घेतात. **मूत्र**— तिखट, कडु, थोडे क्षारयुक्त, उष्ण, वातघ्न, खोकला, प्लीहा, उदर, श्वास, क्षय, मलावष्टंभात हितकर.

**( मेषी )**–स्त्री., **मेषस्य स्त्री, छागी** ( र. ३.१६० ) मेंढी. वनस्पति० **अजशृङ्गी** ( र. २७.३८ ) मेंढशिंगी. वनस्पति० **जटामांसी** ( रा. १२.९१; पृ. ११५ )
जटामांसी.

**–विषाण**–न., **मेषविषाणसदृशं मेषशृङ्गीफलम् मेषशृङ्गीकाथकल्कपक्वं घृतं तिमिरेषूपयुज्यते** ( सुउ. १७.३१ )
मेढशिंगी. मेंढ्याच्या शिंगासारखी शेंग असते. हिने सिद्ध केलेले तूप दृष्टिरोगावर उपयुक्त.

**–शृङ्ग**–न., वनस्पति० **अजशृङ्गी, स च पुत्रञ्जीवकसदृशतरुविशेषः** ( ड. सुसू. ३८.८-९ )
मेढशिंगी. पुत्रजीवासारखा एक वृक्ष. पुत्रजीव, कोल्हापुरात प्रसिद्ध.

**–( शृङ्गी )**–स्त्री., वनस्पति० **अजशृङ्गी** ( सुसू. ३९.६-७ ) मेढ शिंगी.

**–शृङ्गीपुष्प**–न., पुष्प० **विषसंसृष्टेऽञ्जनार्थमुपयुज्यते** ( सुक. १.६९-७१ )
मेढशिंगीचे फूल विषबाधा असताना अंजनाकरिता योजतात.

**मेषक**–पु., वनस्पति० **जीवन्तः** (रापरि. ७.८९; पृ. ३५५)
तांबडी पाने व नाळ असलेली वनस्पती.

**मेषाक्ष**–पु., वनस्पति० **चक्रमर्दः** ( ध. ४.५; पृ. १३४)
तरवटा.

**मेषाक्षिकुसुम**–पु., वनस्पति० **चक्रमर्दः** ( ध., ४.४; पृ. १३४) तरवटा.

**मेषान्त्रि**–पु., **वृषमेधा; बस्तान्त्रिः** ( ध. १ वर्गेतर १; रा. ३.२; पृ. ६८ ) एक वनस्पती.

**मेषास्य**–पु., ग्रह० **अयं पुरुषशरीरग्रहः** ( असंउ. ३ )
पुरुषाकृति एक ग्रह.

**मेषाह्वय**–पु., वनस्पति० **चक्रमर्दः** ( रा. ४.८; पृ. १३५)
तरवटा.

**मेषिन्**–पु., वनस्पति० **तिनिशः** ( रापरि. ९.२४; पृ. ३६५ ) तिवस.

**मेषीमूत्र**–न. **आविकमूत्रम्** ( ध. ६.४९१; पृ. २८३ )
मेंढीचे मूत्र.

**मेह**–पु., रोग० **प्रमेहः** ( चचि. ६.५; सुनि. ६.८ )
द्र० 'प्रमेह' मेह.

**–कर्तनरस**–पु., पारद० **पारदस्तत्तुल्यं नागं पञ्चभागं च कार्पासनिर्यासं दत्त्वाऽगस्त्यस्य बीजशतं क्षिप्त्वा सर्वं चैतत्कार्पासबीजमज्जायुते तक्रे पिष्ट्वा माषमिता गुटिकाः कार्याः; मात्राप्रत्यहमेका गुटिका; अनुपानं कपित्थनिर्यासो माषैकं मधु च; फलं–प्रमेहगणनाशः** ( र. १७.१२१ )

मेहकर्तन रस नावाचे सिद्धौषध. पारा व शिसे समभाग, पाच भाग कपाशीचा काढा, हदग्याचे बी शंभर कपाशीच्या बियांच्या मगजांबरोबर ताकात वाटून उडदाएवढ्या गोळ्या कराव्या. दररोज एक गोळी कवठाच्या १ तोळा काढयात तितकेच मध घालून द्यावी. प्रमेहनाशक.

**–गद्**–पु., **प्रमेहरोगः** ( चचि.६.१३-१४ ) प्रमेहरोग.

**–तिष्यारि**–पु., **वनस्पति० तिक्तखदिरः** (र.१७.६७) तिक्त खैर. कडु खैर.

**करञ्जः** ( र. १७.६७ ) करंज.

**–ध्वान्तविवस्वत्**–पु., **पारद योग० समभागेन पारदगन्धकाभ्रकभस्मानि जम्बीररसेन संमर्द्य तस्मिंस्ताम्रभस्मार्धभागं प्रक्षिप्य गोदुग्धखर्जूरशर्कराहंसपादीद्रावेण गुडूचीसत्त्वयुक्तेन तथा च मांसीहरीतकीकर्कटशृंगीनिर्मलीदन्तीनां क्वाथेन संमर्दयेत् । मात्रा–वल्लः, अनुपानं– शुक्रमेहे शाल्मलीक्वाथः अर्शसि मधु, अश्मर्यां मधु, सर्वमेहेषु गोदुग्धम्** ( र. १७.४८ )

या नावाचे सिद्धौषध. समभाग पारा, गंधक, अभ्रक भस्म समभाग घेऊन ईडलिंबूच्या रसाने खलून त्यात २ भाग ताम्रभस्म घालून गाईचे दूध, खजूर, साखर, राजहंस नावाची वनस्पती यांच्या काढ्याने घोटावे. नंतर गुळवेलसत्वाबरोबर आणि हिरडा, काकडशिंगी, निर्मळी, व दाती यांच्या काढ्यात खलून १ वाल प्रमाणात सेवन करणे. **अनुपान**–शुक्रमेहावर सावरीचा काढा. मूळव्याधीवर मधात, मूतखडारोगात मध, सर्व मेहविकारांवर गाईचे दूध.

**–बद्ध**–पु., **पारदयोग० पारदभस्मकान्तभस्ममुण्डभस्मशिलाजतुमाक्षिकमनःशिलात्रिकटुत्रिफलाऽङ्कोलबीजकपित्थमज्जाहरिद्राः सर्वाणि एतानि त्रिंशद्वारं भृङ्गरसेन मर्दयित्वा संशोष्य च मधुयुक्तं माषमात्रम् लिह्यात् । फलं सर्वमेहनाशः । अनुपानं षण्महानिम्बबीजानि तण्डुलोदकेन पिष्ट्वा माषद्वयं घृतं संमिश्र्य पिबेत्** ( र. १७.१४०-४३ )

या नावाचे सिद्धौषध. पाऱ्याचे भस्म, कांत मुंड, माक्षिकभस्म, शिलाजतु, मनशीळ, त्रिकटु, त्रिफळा, अंकोलांचे बी, कवठाचा गर, हळद, ही सर्व तीस वेळा माक्याच्या रसाने खलून कोरडी करावी. व एक माशाच्या गोळ्या कराव्या, मधातून घेतल्याने सर्व मेहनाशक. मोठ्या निंबाच्या बिया तांदुळाच्या धुवणात वाटून त्यात दोन मासे तूप घालून त्या बरोबर हे घेणे.

**–मर्दनरस**–पु., **योग० सीसभस्माभ्रकभस्मना सह सप्तवारं मर्दयित्वा सप्तवारं पुटेत् । ततस्तत्र कान्तभस्म समभागं क्षिप्त्वा गोमूत्रकशिलाधातुद्रवेण परिमर्दयेत् । शोषयित्वा नागकरण्डके स्थापयेत् । मात्रा–गुञ्जाद्वयम् । अनुपानं निम्बामलकरसः, फलं–सोपद्रवमेहनाशः** ( र. १७.८३-८७ )

मेहमर्दनरस नावाचे औषध. सिसे व अभ्रक यांचे भस्म एकत्र खलून सात वेळा पूट द्यावे. नंतर समभाग कांतभस्म मिश्र करून व कोरडे करून शिशाच्या करंड्यात ठेवावे. गोमूत्र व शिलाजतु घालून खलावे. प्रमाण २ गुंजा. अनुपान–निंबु व आवळ्याचा रस. फळ–प्रमेह उपद्रवांसह नाहीसे करतो.

**–व्रण**–पु., **मेहहेतुको व्रणः** ( सुचि. २.९४ ) मेहाने झालेला व्रण.

**–शत्रु**–पु., **योग० कान्तलोहाभ्रकमण्डूरभस्मानि हरीतकीचूर्णं च क्रमेण पंचषट्पञ्चदशतोलकानि त्रिफला चत्वारिंशत्तोलका एतत् सर्वमेकत्र मर्दयित्वा गुटिकाः कार्याः । फलं–मेहनाशनम्** ( र. १७.६५ )

या नावाचे औषध. कांतलोह, अभ्रक, मंडूर भस्म, हिरडाचूर्ण ही क्रमाने पाच, सहा, पाच, दहा तोळे, त्रिफळा ४० तोळे; सर्व एकत्र करावे व गोळ्या कराव्या. फल–प्रमेहनाशक.

**–हर**–**योग० गन्धकसाहाय्येन सिद्धं राजावर्तभस्म तद्भस्मना मारितमभ्रकं कान्तलोहं चैताभ्यामभ्रककान्ताभ्यां च मारितः सूतः पारदसमो गन्धकश्च एतत् सर्वमेकत्र संमील्य त्रिदिनं–संमर्द्य पुटयेत् । स्वाङ्गशीतमाकुलीबर्बूरगुञ्जामूलानां क्वाथेनाष्टवारं मर्दयित्वा शुष्कं पटचूर्णं कुर्यात् । अयं सकलमेहनाशं करोति** ( र. १७.१०२-८ )

या नावाचे सिद्धौषध. गंधकाने मारलेले राजावर्त–भस्म व त्याने मारलेले अभ्रक व कांतलोहभस्म आणि अभ्रक व कांतभस्माने मारलेला पारा व समभाग गंधक ३ दिवस एकत्र खलून पूट द्यावे. स्वांगशीत झाल्यावर मुंगुसवेल मूळ, बाभूळबी, गुंजामूळ यांच्या काढ्याची भावना आठ वेळ देऊन, सुकवावे. वस्त्रगाळ चूर्ण करून ठेवावे. ते सर्व मेहनाशक.

**मेहन**–पु., वनस्पति० मुष्ककः ( रा. ११.२२०; पृ. १९६ ) मोखा.

**मेहारि**–पु., पारदयोग० अर्धभागयुक्तगन्धकेन पारदस्य कज्जलीं कृत्वा कृष्णधत्तूररसेनैकाहं मर्दयेत् । मृत्कर्पटविलिप्तायां परिपूर्य यामचतुष्टयं लवणयन्त्रे पाचयेत्! स्वाङ्गशीते पारदेऽर्धभागमभ्रकभस्म लोहभस्म च मर्दयेत् । मात्रा–वल्लः । सितामधुयुतं गुडूचीसत्त्वमनुपानम् । समधुपिप्पलीकं चूर्णं वा । फलं–राजयक्ष्मपाण्डुमेहादिनाशः
( र. १७.१३७-३९ )
मेहारि नावाचे सिद्धौषध. पारा व अर्धा भाग गंधक यांच्या कज्जलीला काळ्या धोतऱ्याच्या रसाची १ दिवस भावना द्यावी, मातकापड केलेल्या बाटलीत भरून लवणयंत्रात पचवावे. आपोआप थंड झाल्यावर पाऱ्याच्या अर्धा भाग अभ्रक व लोह भस्म घेऊन खलावे. प्रमाण–एक वाल. खडीसाखर मध गुळवेलसत्व यांबरोबर किंवा मध–पिंपळी बरोबर द्यावे. क्षय, पांडु, मेहादिकांचा नाशक.
न., योनिः ( अहृसू. ७.६९ ) योनि.
मेढ्रम् ( सुसू. ३५.१२ ) शिश्न.

**मैण्मिण्य**–न., सानुनासिकशब्दविशिष्टः शब्दवहधमनीविकारः ( चसू. २६.८४ )
गेंगाणे बोलण्याचा शब्दवाही धमनीचा विकार.

**मैत्र**–पु., काल० अनुकूलो मुहूर्तः ( चवि. ८.९ )
अनुकूल मुहूर्त.

**मैत्रेय**–पु., ऋषि० रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः ( चसू. १.१३ )
मैत्रेय ऋषि. रोगोपचाराच्या विचारविनिमयाकरिता हिमालयाच्या उतरणीवर जमलेल्या महर्षींपैकी एक.

**मैथिल**–पु., तन्त्रकार० रसरत्नसमुच्चयकर्त्रा सिंहगुप्तसूनुनाऽऽलोचितस्तन्त्रकर्ता ( र. १.५-९ )
मैथिल रसशास्त्रकर्ता. रसरत्नसमुच्चयकर्ता, सिंहगुप्तपुत्राने म्हणजे वाग्भटाने ज्याचा ग्रंथ अभ्यासला तो.

**मैथुन**–न., स्त्रीपुरुषयोः संयोगः, व्यवायः (सुशा. २.४८)
स्त्रीपुरुषांचा संभोग.

**मैथुनासहिष्णुत्व**–न., लक्षण० मैथुनेऽसहत्वम्
( सुशा. ९.१२ ) मैथुन सहन न होणे.

**मैमतायनि**–पु., ऋषि० रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु ऋषिष्वेकः ( चसू. १.१३ )
ऋषीचे नाव. रोगहरण विचाराकरिता जमलेल्या ऋषीतील एक.



**मैरेय**–पु., न., आसुत० सुरासवयोः प्रत्येकं निष्पादितयोरेकीकृत्य पुनःसंधानात् मैरेयः
( सुसू. ४५.१८९-१९०; चक. १.१२ ) गुणाः–
मधुरो वृष्यः सन्तर्पणो गुरुः ( असंसू. ६.१३१ )
तीक्ष्णः ( चसू. २७.१८७ ) प्रमेहेषु वर्ज्यम्
( सुचि. ११.५ ) व्रणिनामहितम् ( सुसू. १९.१८ )
षड्धान्यासवेष्वेकम् ( चसू. २५.४९ )
मैरेय म्हणजे सुरा व आसव ही एकत्र करून पुन्हा त्यांचे संधान करून झालेला मिश्र कल्प. **गुण**— गोड, जड, तीक्ष्ण, पौष्टिक, शुक्राला हितकर, प्रमेह, व्रण यांना अहितकर. सहा धान्यासवांपैकी एक.

**मोक्ष**–पु., मुक्तिः, पुरुषस्य संसारजन्ममरणादिभिरसंयोगः ( चवि. ८.३७; चशा. ३.९ )
मुक्ति. जन्ममरणापासून मुक्ति.
विसर्गः ( अहृसू. २१.१२ ) सुटणे.
वनस्पति० मुष्ककः ( र. २.७१ ) मोखा.
( कृष्ण ) पाटला ( र. २.७१ ) काळी पाडळ.
**–काल**–पु., मुक्तिकालः ( असंनि. २.९४ )
मोक्षाचा काल.
**–शास्त्रिकसमय**–पु., मोक्षशास्त्रं सांख्यादिकं तस्मिन्नस्य शब्दस्यायमर्थ इति संकेतः सिद्धान्तविशेषो वा ( चवि. ८.५४ )
सांख्य वगैरे मोक्षविषयक शास्त्रात विशिष्ट शब्दांचे ठरलेले अर्थाचे संकेत.

**मोक्षक**–पु., वनस्पति० मुष्ककः
( ध. ५ १३२; पृ. १९६ ) मोखा.

**मोक्षण**–न., मोचनम् (अहृसू. २९.६४) मोचन, सुटका.

**मोघ**–वि., निष्फलम् ( सुसू. ३१.३२ ) निष्फल.

**( मोघा )**–स्त्री., वनस्पति० सितपाटलिः
(रापरि. १०.१६; पृ. ३६९; रा. ९.१५२; पृ. २९)
पांढरी पाडळ.

**मोच**–न., फल० कदलीफलम् ( अहृसू. ६.११९; असंसू. ७.१७६-७७; चसू. २७.१४३; सुचि. ३१.५ ) द्र० 'कदलीफल' केळ ( फळ )
पु., मोचरसः ( रा. ८.२१५; पृ. १९६ )
सावरीचा डिंक.

**( मोचा )**–स्त्री., वनस्पति० शल्लकी ( अहृसू. १५.२६ )
शल्लकी, साळई.
कदली (र.१७.१२८; ध. ४.७५; पृ. १४८) केळ.
नीलिनी ( ध. १.२३२; पृ. ५५ ) नीळ.

शाल्मली ( ध. ४.१२७; पृ. १९५ ) सावरी.

**–चूर्ण**–न., **मोचरसचूर्णम्** ( असंशा. १.३६ ) मोचरसचूर्ण. सावरीच्या डिंकाचे चूर्ण.

**–निर्यास**–पु., **मोचरसः** ( र. १६.११०; रा. ८.२१५; पृ. १९६; ध. ५.१२६; पृ. १९५ ) सावरीचा डिंक.

**–निर्यासक**–वनस्पति० ( ध. ५.१२६; पृ. १९५ ) सावरीचा डिंक.

**–फल**–न., **कदलीफलम्** ( र. २७.५२-५४ ) केळ.

**–रस**–पु., **शाल्मलीवृक्षस्य निर्यासः महाकषायवर्गे संधानीयगणे एकं द्रव्यं तथैव शोणितस्थापनगणे पुरीषसंग्रहणीयगणे वेदनास्थापनगणे चैकं द्रव्यम्** ( चसू. ४.९-१८ ) **प्रियङ्ग्वादिगणे एकं द्रव्यं** ( सुसू. ३८.४५ ) **गुणाः–कषायः कफवातहरो रसायनो ग्राही बलपुष्टिवर्णवीर्यप्रज्ञायुर्देहसिद्धिदः शाल्मलीतुल्यगुणश्च** ( रा. ८.२१६; पृ. १९६ ) **शाल्मली** ( ध. ५.१९५; पृ. १९५ )
शाल्मली वृक्षाचा डिंक. डिंक. संधानक, रक्त थांबविणारा, मळ बांधणारा, वेदना थांबविणारा, गव्हला इत्यादी गणातील द्रव्य. गुण–तुरट, कफवातहारक रसादिधातु विशुद्ध करणारा, मळ बांधणारा, बल, पुष्टि, वीर्य, वर्ण, बुद्धि, आयुष्य व देह चांगला ठेवणारा. सावरीच्या गुणाचा.

**–सार**–पु., **मोचरसः** ( रा. ८.११५; र. १६.१५; पृ. १९६ ) सावरीचा डिंक.

**–स्राव**–पु., **मोचरसः** ( ध. ५.१२६; पृ. १९६ ) मोचरस.

**मोचक**–पु., वनस्पति० **मुष्ककः** ( रा. ११.२२०; पृ. १९६ ) मोखा.

**(मोचकी)**–स्त्री., वनस्पति० **शाल्मली, व्रणरोपणतैले उपयुज्यते** ( सुचि. २.५४; असंसू. ३.२१ ) सावरी. व्रण रुझवणाऱ्या तेलात उपयुक्त.

**मोटा**–स्त्री., वनस्पति० **बला** ( रा. ४.४२२; पृ. ६४ ) चिकणा.

**मोदक**–पु., **बृहद्गुटिका** ( चक. ७.३६; र. १७.६७ ) मोठ्या आकाराच्या गोळ्या.
**भक्ष्य० लड्डुकः, गुणाः–बृंहणाः, सुदुर्जराश्च** ( सुसू. ४६.३९५-३९६ )
लाडू, पौष्टिक व पचावयास जड.

**( मोदकी )**–स्त्री., **जिङ्गिणी** ( ध. ३.२२; पृ. १३२ ) काळी सावरी पर्वतात होणारी मंजरीसारखी फुले येणारी वनस्पती.

**–कल्प**–पु., **सूदशास्त्रोक्तमोदकपाकविधिः** ( चक. १.२३ ) मोदक, लाडू इ० करण्याचा विधी.

**–मोदक**–पु., **तवराजशर्करा** (रा. १४.१६५ पृ. ९२) एक साखर; धमाशाची साखर.

**मोदनी**–स्त्री., वनस्पति० **यूथिका**(रा.१०.२५०;पृ.२००) जाई.

**मोदयन्ती**–स्त्री., वनस्पति० **मल्लिका** ( सुचि. २५.३३ ) मोगरा.

**मोदा**–स्त्री., वनस्पति० **अजमोदा** (ध. २.९८; पृ.८९ ) अजमोदा. ओवा.

**मोदाढ्या**–स्त्री., वनस्पति० **अजमोदा** (रा. ६.१५१; पृ. ९९ ) अजमोदा.

**मोदिनी**–स्त्री., वनस्पति० **मल्लिका** (रा. १०.२२५; पृ. १९७; रापरि. १०.२३; पृ. ३६९ ) मोगरा.
**मल्लिका० वृत्तमल्लिका** (रा. १०.२२७; पृ. १९७) बटमोगरा.
**अजमोदा** (रा. ६.१५१ पृ. ९०) अजमोदा, ओवा.
**मद्यम्** ( रा. १४.३०३; पृ. २५४ ) दारू.

**मोरट**–पु., न., **सद्यःप्रसूतायाः गोः क्षीरं, सप्ताहं यावत् पीयूषः, तदेव सप्ताहात्परतो यावत्प्रसन्नतां न गच्छति तावन्मोरट इत्युच्यते, गुणाः–मधुरो बृंहणो वृष्यश्च** ( सुसू. ४५.९१ ) **दीप्ताग्नीनामनिद्राणां सुखप्रदम्, तथा गुरु, तर्पणं, वृष्यं, पवननाशनं च** ( चसू. २७.२३४ )
गाय व्याल्यापासूनच्या ७ दिवस पर्यंतच्या घट्ट होणाऱ्या दुधाला पीयूष म्हणावे. आणि नंतर नेहमीसारखे दूध होईपर्यंत जे ढिले, घट्ट, पातळ असते त्यास मोरट म्हणावे. **गुण**—गोड, पौष्टिक, शुक्राला हितकर, अग्नि दीप्त असणाऱ्याला झोप न येणाऱ्याला सुखप्रद, जड व पौष्टिक.
**वनस्पति० मूर्वा०** (ध. १.१५; पृ. ९) मोरवेल.
**इक्षुमूलम्** ( र. २.७१; सुचि. ७.९ ) उंसाचे मूळ.
**अङ्कोलपुष्पः 'मोइहर' इति लोके (डल्हणः) हस्तिकर्णपलाशः वरुणादिगणे वीरतर्वादिगणे चैकं द्रव्यम्** ( सुसू. ३८.१०-११ )
अंकोलाचे फूल; मोहर. एक पळस. वायवर्णा इत्यादी काळा वाळा इत्यादी गणांतील एक द्रव्य.

**(मोरटा)**–स्त्री., वनस्पति० मूर्वा ( ध. १.१३; पृ. ९ ) मोरवेल.

**मोरण**–पु., क्षीरसदृशः किलाटिकः; दध्ना तक्रेण वा सह पाकात् पृथग्भूतं घनद्रवभागं क्षीरं–कूर्चिका। सैव पाकाद्विना क्षीरशाकः। तयोर्घनभागः पृथगुद्धृतः–किलाटः, द्रवभागो मोरणः; गुणाः– शुक्रनिद्राकफकरः विष्टम्भिगुरुदोषलः ( अहसू. ५.४१ )
दूध व ताक किंवा दही घालून शिजवलेला पदार्थ म्हणजे कूर्चिका. यातील जो घन भाग तो किलाट व द्रवभाग मोरण. **गुण**—शुक्र, निद्रा व कफकर. अवष्टंभक जड व दोषकर.

**मोह**–पु., अज्ञानं, तमः, मनोविकार०; मोहमविज्ञानेन परीक्षेत ( चवि. ४.८; चनि. ७.४ )
अज्ञान; अंधःकार. ज्ञान ग्रहण होत नाही यावरून मोह ओळखावा.
**लक्षण० मनसो वैचित्यम्** ( सुउ. ६२.६ ) **उच्छ्वासजोदावर्तलक्षणम्** ( सुउ. ५५.१७ ) उच्छ्वासाच्या अवरोधाचे लक्षण.
**कार्याकार्यानभिज्ञत्वम्, विचाराशक्तिः** ( अहसू. १.१ )
मनाच्या विचारशक्तीचा ऱ्हास, मन विचलित असणे; कार्य, अकार्य न समजणे; विचार करण्याचे असामर्थ्य.
**रोग० मूर्च्छा, सुखदुःखसंज्ञानाशः** ( सुउ. ४६.७; सुनि. १.२३ ) बेसावधपणा.
**–धूप**–पु., मोहकरधूपकल्पविशेषः (काधूपकल्पाध्याय.१.)मोह करणारा धूपाचा एक योग.

**मोहन**–पु., वनस्पति० धत्तूरः (रा. १०.१२; पृ. १३५) धोतरा.
**–वल्लिका**–स्त्री., वनस्पति० वटपत्रा, वटपत्रिका ( सुउ. ६०.४८ ) मोगरा, मोगरी.
**–वल्ली**–स्त्री., वनस्पति० ब्राह्मी ( असंउ. ८ ) ब्राह्मी. **शिरीषः** ( असंउ. ८ ) सिरस, शिरस.

**मोहनिका**–स्त्री., वनस्पति० पुत्रजीवः (सुचि. २८.२२) ज्याच्या फुलांच्या माळा पुत्रप्राप्तीकरिता घालतात, असा वृक्ष.
**वनस्पति० 'अवाक्पुष्पी'** ( सुचि. २८.२२ ) शतपुष्पा, मिश्रेया, बडिशेप.

**मोहांश**–पु., मोहो विपरीतज्ञानं तस्यांशः, मूढतांशः (चशा. ४.३९ )
मोह म्हणजे विपरीत ज्ञान. त्याचा अंश.

**मोहिनी**–स्त्री., वनस्पति० उपोदकी ( रापरि. ७.७४; पृ. ३५३ ) थोर मयाळ-प्रकार.
**रेवतीग्रह० इयं जातहारिणी** ( कारेवतीकल्प ३९ ) एक रेवतीग्रह. जन्मल्याबरोबर बालक मारणारी.

**मौकिरण**–पु., भूताधिपति० अष्टादशानामेकतमोऽयम् ( असंउ. ७ ) भूताधिपतीचे एक नाव.

**मौक्त**–वि., मुक्ताया इदम् ( सुउ. १०.१५ ) मोत्याचे ते मौक्त. मोत्याचा ( हार, भस्म इत्यादी ).

**मौक्तिक**–न., प्राणिजद्रव्य० मौक्तिकयोनयः शुक्तिः शङ्खो गजः क्रोडः फणी मत्स्यो दर्दुरो वेणुश्चेत्यष्टौ ( र. ४.१४ ) तत्र मौक्तिकं शुक्तिजं श्रेष्ठम्; उत्तमं तथा शुभं मौक्तिकमाकारेण महद्गोलाकारं ह्लादि श्वेतं लघु स्निग्धं रश्मिवन्निर्मलं तोयप्रभं च (र. ४.१४) यत्तु रूक्षाङ्गं निर्जलं श्यावं ताम्राभं लवणोपममर्धशुभ्रं विकटाकारं ग्रन्थिलं च तत्त्याज्यम् ( र. ४.१५ ) नवरत्नेष्वेकम् ( र. ४.५ ) गुणाः– मधुरं शीतं सरं वीर्यकृत् बल्यं पुष्टिकरं पित्तघ्नं दृष्टिरोगविषदाहराजयक्ष्ममुखरोगघ्नं च ( ध. ६.६२; पृ. २१८ ) मधुरं लघु हिमं कान्तिदृष्ट्यग्निपुष्टिकरं भेदि विषनाशनं वीर्यप्रदं कफपित्तनाशनं कासश्वासक्षयाग्निमान्द्यनाशनं दाहघ्नमायुष्यं च ( र. ४.१५ ) विसर्पे सर्पिषा सह प्रदेहार्थमुपयुज्यते ( चचि. २१.८१ )
मोती. शिंपल्यात समुद्रातील प्राण्यापासून बनणारा एक पदार्थ. मोती शिंप, शंख, हत्ती, डुक्कर, नाग, मासा, बेडुक, वेळू यात होतो. शिंपेतला मोती सर्वात श्रेष्ठ. **उत्तम** तसाच **शुभ मोती**–आकाराने मोठा, गोल आकाराचा, पांढरा, हलका, स्निग्ध, सतेज, स्वच्छ, पाण्यासारखा ( पाणीदार ) आनंद निर्माण करणारा असतो. त्याज्य मोती–जो रूक्ष पाणी नसलेला, काळसर, तांबडसर, मिठासारखा, अर्धा पांढरा, वेडावाकड्या आकाराचा, गाठाळ असतो तो. मोती हे नवरत्नातील एक रत्न मानले आहे. **गुण**–गोड, थंड, सारक, वीर्यकर, बल, व पुष्टिकर, पित्तनाशक, दृष्टिरोग, विष, दाह, क्षय, मुखरोग नाशक. हलका, थंड, कांति, अग्नि, खोकला, श्वास, अग्निमांद्य नाशक; आयुष्यवर्धक, धावऱ्यावर तुपातून लेप द्यावा.
**–तण्डुल**–पु., वनस्पति० धवलयावनालः धान्यविशेषः ( रा. १६.१६८; पृ. २२९ ) पांढरा जोंधळा.

**मौक्तिकेय**–न., प्राणिजद्रव्य० मौक्तिकम् ( रा. १३.६६; पृ. २१८ ) मोत्याचे.

**मौच**–वि., मोचस्येदमिति मौचं ( कदलीफलम् ) मोचफलमित्यर्थः, कदलीफलम्, गुणाः–स्वादुरसं कषायं नातिशीतलं रक्तपित्तहरं वृष्यं रुच्यं श्लेष्मकरं गुरु च ( सुसू. ४६.१८१ )
मोच म्हणजे केळ. तिचे ते मौच म्हणजे केळफळ.
**गुण**— मधुर, तुरट, किंचित शीत, रक्तपित्तनाशक, शुक्रवर्धक, कफकर आणि रुचिकर व पचनास जड

**मौञ्जीतृण**–न., वनस्पति० मुञ्जः (रा. ८.२०४;पृ. १६०) मुंजा, मोळ, लव्हाळा.

**मौञ्जीपत्रा**–स्त्री., वनस्पति० बल्वजा ( रापरि. ८.४०; पृ.३६० )मोळ, लव्हाळा, मुंजा.

**मौढ्य**–न., मूढता, अज्ञानम् ( असंशा. १२.१९ ) मूर्खपणा, अज्ञान.

**मौत्रकृच्छ्रिकी**–वि., मूत्रकृच्छ्रे प्रोक्ता तदुपयोगिनी वा, ( चिकित्सा ) ( चवि. ५.२८ )
मूत्रकृच्छ्रावर उपयोगी. ( चिकित्सा. )

**मौद्गरस**–पु., मुद्गयूषः ( असंसू. ६.४८, अहृसू. ६.३३ ) मुगाचे कढण.

**मौद्गल्य**–पु., ऋषि० यज्ञःपुरुषविषये विवदमानानामेकतमः पारिक्षिः ( चसू. २५.८ )
ऋषीचे नाव. पुरुषाच्या उत्पत्तीविषयी वादविवादात भाग घेणाऱ्या ऋषींपैकी एक. पारीक्षी हे याचे आणखी एक नाव.

**मौलिन्**–वि., मुकुटधारी, मौलिर्मुकुटम् तद्वान् (सुचि.३०.७) मौली म्हणजे मुकुट. मुकुट घातलेला.

**मौस्तकषाय**–पु., मुस्ताया अयमिति मौस्तः, मुस्तकाथः पक्कातीसारे उपयुक्तः ( सुउ. ४०.७२ )
नागरमोथ्याचा काढा. पक्क अतिसारावर उपयुक्त.

**मौहूर्तिक**–पु., मुहूर्तः ज्योतिःशास्त्रोपलक्षणम्, तज्जानाति इति मौहूर्तिकः ज्योतिर्विद् ( असंशा. १.५४ )
ज्योतिषशास्त्रज्ञ.

**म्रक्षण**–न., आलेपनम् ( सुचि. ९.१८ ) लेप करणे.

**म्रक्ष्ण**–न., लेपनम् ( असंउ. २४ ) लेप लावणे.

**म्रदिमन्**–पु., मृदुत्वम् ( असंसू. ८.१२ )
मृदुशब्दादत्र इमानिच्प्रत्ययो ज्ञेयो भावार्थे।
मऊपणा.

**म्लान**–पु., वनस्पति० राजतरणी ( रा. १०.२४६ ) शेवती, शेवंती.

**-ता**–स्त्री., ग्लानिः ( असंसू. ३२ ) ग्लानि, गळाठा, गळणे.

**म्लानाङ्ग**–न., शुष्कं शुष्यद् वा अङ्गम् ( सुचि. ५.७ ) म्लान शरीर, सुकलेले अंग.

**म्लानि**–स्त्री., म्लानता किंचिच्छुष्कत्वम् ( अहृसू. ७.९ ) म्लानता, ग्लानि. अंग किंचित सुकणे.

**म्लायिन्**–वि., क्षययुक्तम् ( सुउ. ७.२८ ) क्षीणत्त्वयुक्त, क्षययुक्त.

**म्लेच्छ**–न., खनिज० हिङ्गूल ( ध. ६.४०; पृ. २१४ ) हिंगूळ.
खनिज० ताम्रम् ( र. १२.१२१-२२ ) ताम्र.

**-कन्द**–पु., वनस्पति० लशुन (ध. ४.६६; पृ. १४७) लशुन, लसुण.

**-भोजन**–पु., वनस्पति० गोधूमः ( ध. ६.९७, पृ. २२७) गहू.

**-मुख**–न., खनिज० ताम्रम् ( ध. ६.९; पृ. २०७ ) तांबे.

**म्लेच्छक**–न., खनिज० ताम्रप्रकार० ( र. ५.४९ ) तांब्याचा प्रकार.

# आयुर्वेदीय - शब्दकोशः

## य



**यकृत्**–न., शारीर० पञ्चदशकोष्ठाङ्गेष्वेकम्, दक्षिणकुक्षेरधःस्थशरीरावयवः ( चशा. ७.१० ) रञ्जकपित्ताधारः शोणितवहानां स्रोतसां मूलम् (च. वि. ५.८) दक्षिणपार्श्वस्थं कालखण्डम्, रक्तधराकलायाः पुरीषधराकलायाश्च स्थानम् ( सुशा. ४.१०;ड.१७ ) उत्पत्तिः–तच्छोणितजम् ( सुशा. ४.२५ ) तस्य स्थानम्–हृदयस्य दक्षिणतो यकृत् क्लोम च ( सुशा. ४.३१ ) रसधातुः यकृत् प्लीहानौ प्राप्य रागमुपैति। यकृतः रक्तधराकलायां शोणितं भवति। तत्रस्थं शोणितं शेषाणां शोणित स्थानानां बलदानेनानु ग्रहं करोति ( सुसू. १४.४; सुशा. ४.१० )
यकृत्. पंधरा कोष्ठांगांपैकी एक. रंजकपित्ताचे स्थान, रक्तवह स्रोतसांचे मूल, रक्तधरा कला व पुरीषधरा कला यांचे स्थान. रक्तापासून तयार झालेला अवयव. रसधातु यकृत् प्लीहेमध्ये आल्यावर तेथील रंजकपित्ताने त्याला लाली येते. यकृताच्या रक्तधरा कलेत रक्त तयार होते. त्या रक्तामुळे इतर रक्तस्थानांना बल मिळते.

**–पिण्ड**–पु., शारीर० यकृत् ( सुउ. ६.१४ ) यकृत.

**–प्रकाश**–वि., यकृत्खण्डसंनिभं कृष्णलोहितम् ( सुनि. २.११ )
यकृताच्या तुकड्याप्रमाणे दिसणारा काळसर तांबुस ( विद्रधि. )

**( यकृज्–)ज**–वि., यकृति जातः ( चसू. ७.१०१ )
यकृतात झालेला.

**( यकृद्–) दालिन्**–यकृन्नाशकम्, दोषैर्यकृद्भेदयति, दालयतीति ( मानि. सुनि. ७.१६ )
यकृताचा नाश करणारे, यकृताचा भेद करणारे.

**–दाल्युदर**–न., रोग० उदरभेदः तस्योत्पत्तिं प्लीहोदरवद्विजानीयात्। तल्लक्षणानि–आतुरो विशेषतः सीदति। मन्दज्वराग्निः कफपित्तलिङ्गैरुपद्रुतः क्षीणबलोऽतिपाण्डुश्च भवति। दक्षिणे पार्श्वे यकृद् वृद्धिमेति ( सुनि. ७.१६ )
यकृत दाल्युदर हा उदररोगाचा प्रकार.
प्लीहोदराप्रमाणेच याची उत्पत्ति समजावी. **लक्षणे**— रोगी अतिशय थकतो, ज्वर, सौम्य, अग्निमंद, कफपित्त दोषाचे सर्व उपद्रव, शक्तिक्षीणता व शरीर अत्यंत पांढुरके. पोटाच्या उजव्या बाजूला यकृत वाढलेले असते.

**–रस**–पु., छागल्यादिकालखण्डरसः ( ड. सुउ. १७.१७-१८ )
बकरा वगैरे प्राण्यांच्या यकृताचा रस.

**यक्ष**–पु., देवयोनि० ( ड. सुक. ७.६१-६२; चनि. ७.१० ) कुबेरादयः (सुसू. ५.२१) भूताधिपतिः (असंउ. ७) यक्ष. कुबेर वगैरे देवस्वरूपी. भूतांचा मुख्य.
**वनस्पति०** वटः ( र.११.३९ ) वड.
**निर्यास०** रालः ( र. ११.३९ ) राळ.

**( यक्षी )**–स्त्री., रेवतीग्रह० सा द्वितीये दिवसेऽपत्यं विनाशयति ( कारेवतीक. ४४ )
रेवती नावाचा स्त्रीग्रह. बालक जन्मल्यानंतर दुसऱ्या दिवशी बालकाला मारते.

**–कर्दम**–पु., सुगन्धिद्रव्यगण० कुङ्कुमागरुः महासुगन्ध इत्यपरपर्यायः, कर्पूरः, कस्तूरी, चन्दनम्, तद्गुणाः–शीतः, सुगन्धिः, कान्तिप्रदो त्वग्दोषशिरोर्तिविषनाशनः ( ध. ७.४५ )
अत्यंत सुगंधी द्रव्यांचा समुदाय. केशर, अगरू, कापूर, कस्तूरी, चंदन इत्यादी० त्याचे गुण–शीत, सुगन्धि, कान्तिदायक, त्वचादोष, शिराचे विकार, विष यांचा नाश करणारा आहे.

**–गुहा**–स्त्री., वनस्पति० पृश्निपर्णी ( काखिल. अ. ११.९७ ) पिठवण.
**शालिपर्णी** ( काखिल. अ. ११.९७ ) सालवण.

**–ग्रह**–पु., ग्रह० यक्षाऽऽविष्टलक्षणानि–रक्तनेत्रः कमनीयसूक्ष्मरक्तवस्त्रधारी, प्रचुरसत्वो द्रुतमतिरल्पवक्ता, क्षमाशीलस्तेजस्वी केनापि अभिलषितं वस्तु ददामि इति भाषिता ( सुउ. ६०.११ )
यक्षग्रहाने पीडीत. लक्षणे–डोळे लाल, सुंदर, तलम, तांबडे वस्त्र धारण करणारा, बलवान मनाचा, अस्थिरवृत्ति, थोडे बोलणारा, क्षमाशील, तेजस्वी, इच्छिलेले देतो असे बोलणारा.

**–तरु**–पु., वनस्पति० वटः ( रा. ११.११४ ) वड.

**–दिश्**–स्त्री., यक्षराट्कुबेरस्य दिशा 'उदीची' ( र. ७.१-२ ) कुबेराची दिशा, उत्तर दिशा.

**–धूप**–पु., **निर्यास०** **रालः** ( ध. ३; ध. ३.१२१ ) राळ.
**वनस्पति०** **सर्जकः** ( रा. ९.२०५ ) राळ.
**–लोचन**–पु., **वनस्पति०** **पूतिकरञ्जः** ( र. ११.३७-३९ ) करंजभेद.

**यक्षाक्ष**–पु., **वनस्पति०** **पूतिकरञ्जः** ( र. ३०.६९ ) करंजप्रकार.

**यक्षावास**–पु., **वनस्पति०** **वटः** ( रा. ११.१४४ ) वड.

**यक्षोन्माद**–पु., **रोग०** ( चवि. ९.२० ) एक उन्माद.

**यक्ष्मन्**–पु., **रोग०** **राजयक्ष्मा** ( चइ. ५.८ ) राजयक्ष्मा, क्षय.
**रोगः** ( चनि. १.५ ) रोग.
**ज्वरः** ताप.
**दोषः** ( चवि. ६.४ ) दोष.

**यक्ष्मिन्**–वि., **यक्ष्मरोगी** ( सुउ. ४१.३१ ) राजयक्ष्मारोगी. क्षयी.

**यजुस्**–न., **यजुर्वेदः**, **चतुर्णां वेदानामेकः** (चसू.३०.२०) यजुर्वेद, ४ वेदांपैकी एक.

**यज्ञःपुरुषीय**–वि., **अध्यायसंज्ञा०** ( चसू. २५.१ ) अध्यायाचे नाव. पुरुषाच्या उत्पत्तीविषयी माहिती यात आहे.

**यज्ञ**–पु., **यज्ञदेवता** ( चक्र. चवि. ३.२४ ) यज्ञदेवता.
**–नेत्री**–स्त्री., **वनस्पति०** **सोमवल्ली** ( धपरि. ४.४ ) सोमवल्ली.
**–भूषण**–पु.,( परिव० ) **वनस्पति०** **दर्भः** ( रा. ८.२०७ ) दर्भ.
**–योग्य**–पु., **वनस्पति०** **उदुम्बरः** ( रा. ११.३६ ) उंबर.
**–वल्ली**–स्त्री., **वनस्पति०** **सोमवल्ली** ( रापरि. ३.३ ) सोमवल्ली.
**–वृक्ष**–पु., **वनस्पति०** **वटः** ( रा. ११.११६ ) वड.
**–श्रेष्ठा**–स्त्री., **वनस्पति०** **सोमवल्ली** ( रापरि. ३.३ ) सोमवल्ली.

**यज्ञाङ्ग**–पु, **वनस्पति०** **उदुम्बरः** ( ध. ५.८६ ) उंबर.
**खदिरः** ( रा. ८.३१ ) खैर.

( **यज्ञाङ्गा** )–स्त्री., **वनस्पति०** **सोमवल्ली** ( रापरि. ३.३ ) सोमवल्ली.

**यज्ञिय**–पु., **वनस्पति०** **विकङ्कतः** ( रा.९.५५ ) वेहेकळ.
**उदुम्बरः** ( ११.१३६ ) उंबर.

( **यज्ञिय** )–**पत्रक**–पु., **वनस्पति०** **दर्भः** ( रा. ८.२०७) दर्भ.

**यज्ञीया**–स्त्री., **सुरा** ( चचि. २४.५ ) यज्ञातील दारू.

**यज्ञौही**–स्त्री., **यज्ञं वहतीति; अनेन लौकिकयज्ञान्तराण्यपि सुरया क्रियन्ते इत्युच्यते** ( चक्र. चचि. २४.४ ) सुरा म्हणजे मद्य हे सौत्रामणि इ० यज्ञात तर वापरले जातेच पण लौकिकाचाराच्या यज्ञामध्येही त्याचा उपयोग होतो, असे सुरेचे माहात्म्य आहे. अशा त्या सुरेला ' यज्ञौही ' नाव आहे.

**यतवाच्**–वि., **वाक्संयमी वाग्यतः** ( असंसू. ३ ) जपून बोलणारा.

**यत्त**–वि., **यत्नपरः** ( सुसू. ३४.७-८ ) यत्नशील, यत्नपर.

**यथा**–अ., **यादृक्** ( चसू. २५.४० ) ज्याप्रमाणे.
**–काल**–अव्य., **कालमनतिक्रम्य** ( सुशा. ४.१९ ) योग्य वेळी. वेळ न घालवता.
**–चित्र**–अव्य., **यथाविन्यासम्** ( चवि. ६.५ ) योग्य रीतीने. जसे ठेवले असेल तसे.
**–न्याय**–अव्य., **यथागमम्** ( चसू. १४.५ ) जसे शास्त्रात सांगितले तसे.
**–प्रधान**–अव्य., **प्रधानं नाम प्राधान्यम्, प्राधान्यमनतिक्रम्य इति यथाप्रधानम्** ( सुचि. ३१.५ ) दर्जाप्रमाणे, योग्यतेप्रमाणे, प्राधान्य असेल त्याप्रमाणे.
**–प्रयोजन**–अव्य., **प्रयोजनस्यानतिक्रमेण** (सुचि. ३१.५ ) गरजेप्रमाणे.
**–सात्म्य**–अव्य., **हस्तपादादीनां सात्म्यविरोधि यथा स्यात्तथा** ( चसू. २५.४० ) हातपाय इ० अवयवांना मानवतील एवढेच श्रम त्यांच्याकडून घेणे. याला यथासात्म्य म्हणतात. सेवनीय गोष्टीत हे श्रेष्ठ गणले आहे.

**यथाग्नि**–अव्य., **अग्निमनतिक्रम्य** ( चसू. २५.४० ) अग्नीच्या शक्तीप्रमाणे.

**यथार्थ**–अव्य., **यथाप्रयोजनम्, अर्थः प्रयोजनम्, तेन यथार्थं यथाप्रयोजनम्** ( सुशा. ४.२८ ) जसे असेल तसे, खरे, अन्वर्थक.

**यथोद्देश**–अव्य., **उद्देशमनतिक्रम्य** ( चशा. ४.४१ ) उद्देशाप्रमाणे.

**यदृच्छा**–स्त्री., **अलक्षिता, अतर्कितोपनतत्वम्** (सुशा. १.११) लक्षात न येताच आकस्मिक घडणे,

**-सिद्धि**-स्त्री., अकस्मात्सिद्धिः ( चसि. २.२८ ) अकस्मात काम सिद्ध होणे.

**यन्त्र**-न., **पारदादेरेकत्र स्थिरीकरणार्थं साधनम्, बार्तिकैः स्वेदनादिकर्मार्थं निर्मितं दोलायन्त्रादिकम्** ( र. १.९-१० )

पारा व इतर धातु यांची शुद्धि, द्रुति, भस्म, सत्व इ० करण्यास उपयोगी पडणारे साधन. दोलायंत्र वगैरे.

**शल्यानामाहरणोपायः; एतादृशानि यन्त्राण्येकोत्तरशतम्। अन्ये तु शतशब्दस्य संख्यामात्रत्वादसंख्यानि यन्त्राणीत्याहुः** ( सुसू. ७.३ ) **लोहवेणुवृक्षसूत्रशृङ्गवल्कलतृणानि स्नायुप्रताना अश्मानश्चेतेभ्यो यन्त्राणि निष्पाद्यन्ते तानि च स्वस्तिकयन्त्राणि संदंशयन्त्राणितालयन्त्राणि नाडीयन्त्राणि शलाकायन्त्राण्युपयन्त्राणि चेति पुनरपि षोढा** ( सुसू. ७.५ ) **यन्त्रकर्माणि चतुर्विंशतिः—निर्घातनपूरणबन्धनव्यूहनवर्तनचालनविवर्तनविवरणपीडनमार्गविशोधनविकर्षणाहरणाञ्छनोन्नमनविनमन—भञ्जनोन्मथनाचूषणैषणदारणर्जूकरणप्रक्षालनप्रधमनप्रमार्जनानि** ( सुसू. ७.१० ) **अतिस्थूलाऽसाराऽतिदीर्घाऽतिह्रस्वाऽग्राहिविषमग्राहिवक्रशिथिलात्युन्नतमृदुकीलमृदुमुखमृदुपाशभेदेन यन्त्रदोषा द्वादश** ( सुसू. ७.१९ ) **तत्र यन्त्रमूलं नाम यन्त्रमुष्टिः** ( अहृसू. २५.६ )

यंत्र. शल्य काढण्याकरिता उपयोगी पडणारे; अशी यंत्रे एकशे एक आहेत. कांहीच्या मते शंभर. याचा अर्थ–संख्या म्हणजे असंख्य यंत्रे आहेत. लोह, बांबू, वृक्ष, सूत्र, शृंग, वल्कल, तृण इत्यादींपासून यंत्रे तयार करतात. स्वस्तिकयंत्र, संदंशयंत्र, तालयंत्र, नाडीयंत्र, शलाकायंत्र आणि उपयंत्र अशी सहा प्रकारची यंत्रे आहेत. त्यांची कामे चोवीस प्रकारची आहेत. हालवून काढणे, तेल इ० घालणे, दोरी इ० नी बांधणे, वर नेणे, चाळवणे ( हालवणे ). आतच फिरवणे, मांसछेद करून जागा निर्माण करणे, दाबणे, मळ बाहेर काढणे, स्रोतस मोकळे करणे, ओढून काढणे, बाहेर आणणे, तोंडाजवळ आणणे, वर करणे, खाली करणे, फोडणे, सळईने आत फिरविणे, चोखणे, सळईने व्रणमार्ग तपासणे, तोडणे, सरळ करणे, पाणी इ० ने धुणे, नळीने चूर्ण फुंकणे, बोटाने केस कपडा इत्यादींने बारीक कण पुसणे, अतिजाड, तकलादी, अतिलांब, अतिआखूड, धरता न येण्यासारखे, धरण्यास वेडेवाकडे, वाकडे, सैल, अतिउंच, नरम खिळ्याची, तोंड मऊ, पकड ढिली इ० यंत्रदोष.

**शरीरसंधिः** ( चसु. १२.८ ) शरिराचा सांधा.

**-निपीडन**-पु., **रज्ज्वादिबन्धनम्** (अहृसू. २७.५१) दोरी वगैरेने बांधणे.

**-विधि**-पु., **यन्त्रकल्पनं यन्त्रभेदो वा** ( सुसू. ७.१ ) यन्त्राचा उपयोग, यंत्रप्रकार.

**-विध्यध्याय**-पु., अध्यायसंज्ञा० ( सुसू. ७.१ ) अध्यायाचे नाव. यात यंत्राची माहिती आहे.

**यन्त्रण**-न., **पट्टग्रन्थैर्बन्धनं तच्चोर्ध्वादिभेदेन त्रिधा** ( सुसू. १८.१९ )

पट्टा बांधणे, गाठ बांधणे, खाली वर मध्ये अशी तीन प्रकारची.

**( यन्त्रणा )**-स्त्री., **व्रणबन्धः यन्त्रणवदियमपि त्रिधा** ( सुसू. १८.३६ ) व्रणावर बंध बांधणे. प्रकार तीन.

**-शाटक**-न., **रुग्णस्य नियन्त्रणार्थमुपयुज्यमानो वस्त्रविशेषः** ( सुचि. ६.४ )

मूळव्याध इ० सारख्या विकारात मोडांवर क्षार चिकित्सा करावयाची असता रोग्याने हालचाल करू नये म्हणून डोके, पाय वगैरे बांधून ठेवण्यासाठी वापरलेले वस्त्र.

**यन्त्रोपाय**-न., **यन्त्रणप्रकारः** ( सुशा. ८.८ ) यन्त्रणाचा प्रकार.

**यम**-पु., **देहेन्द्रिययोर्निरोधः** ( सुचि. २९.१० ) **अहिंसा सत्यमस्तेयं ब्रह्मचर्यमपरिग्रहश्चेति पञ्च योगसूत्रोक्ताः यमाः** ( ड. सुचि. १.१३३ )

देह आणि इंद्रिये यांचे नियमन. अहिंसा, सत्य, चोरी न करणे, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह यांना योगसूत्रात पाच यम म्हटले आहे.

**ज्वरः यम्यते नियम्यते अन्तं नीयते जीवितमनेनेति यमो ज्वरः** ( सुउ. ३९.९५-९६ )

ताप. यम्यते म्हणजे नियंत्रण केले जाते, ज्याने जीवित शेवटाला नेले जाते तो यम म्हणजे ज्वर.

**युग्मम्** ( चशा. २.११ ) जोडी, जुळे.

**-कुल**-न.; **यमगृहम्, मृत्युगृहम्** ( काजातिसूत्रीय. ) यमाचे गृह, मृत्यूचे घर.

**-क्षय**-पु., **यमगृहम्** ( चइ. ४.१८ ) मृत्युस्थान.

**-ज**-वि., **यमयोर्गर्भयोरेकः यमलः** ( कारेवती ). जोडीने जन्मलेले, जुळ्यांपैकी एक.,

**–द्रुम**–पु., वनस्पति० **शाल्मली** ( रा. ८.२१२ )
सावरी.

**–राष्ट्र**–न., **यमालयः** ( सुसू. ३१.२३ )
मृत्यूचा दरबार.

**–सत्त्व**–वि., **चित्तप्रकृतिः प्राप्तकारी दृढोत्थानो निर्भयः शुचिः स्मृतिमान् रागमोहमदद्वेषरहितश्च पुरुषो यमसत्त्ववान्** ( सुशा. ४ ८६ ) **सात्विककायलक्षणेष्वेकम्** ( सुशा. ४.८६ )
सात्विक प्रकृतीचा एक प्रकार. वेळेवर आलेले कार्य करणारा, कार्यारंभ दृढनिश्चयाने करणारा, निर्भय, आचारविचाराने पवित्र, स्मरणशक्ति दृढ आहे असा, राग– मोह– मद– द्वेष रहित, पुरुष यमसत्त्व समजावा. सात्विक कायलक्षणांपैकी एक.

**यमक**–पु., **घृततैले स्नेहद्वयम्** ( चसू. २.२७ )
यमक स्नेह, तेल आणि तूप.
**व्रणबन्धः, द्वयोर्व्रणयोः संयमनो बन्धः** ( सुसू. १८.१७-१८ )
दोन व्रणावर जोडून बांधलेला बंध.

**(यमिका)**–स्त्री., रोग० **हिक्काप्रकारः, अयं यमलवेगेन जायते** (चचि.१७.४३) जोड आवाजाची (उचकी.) **रेवतीग्रहस्य नाम** ( काबालग्रहचि. )
यमिका हे रेवतीग्रहाचे नाव आहे.

**यमल**–वि., **युग्मजम्, सद्वितीयम्** (सुउ. ५०.१०-११ )
जोडीने झालेला, जुळा.

**(यमला)**–स्त्री., **हिक्कारोगः; यमिका** (सुउ.५०.१०-११) यमिका नावाची उचकी जोडीने ( दोन ) आवाजांची.

**–च्छद**–पु., वनस्पति० **कोविदारः** (रा. १०.२९३)
कांचनार.

**–पत्रक**–पु., वनस्पति० **अश्मन्तकः** ( ध. ४.९४ )
आपटा.

**–वेग**–पु., **हिक्काया वारद्वयं बहिःप्रवर्तनम्** ( सुउ. ५०.१०-११ ) जोड उचकी येणे.

**यमानी**–स्त्री., वनस्पति० **अजमोदा** ( चक. १२.२४ )
अजमोदा.

**–षाडव**–न., चूर्णकल्प० **यवानीषाडवम्** ( चचि. ८.१४१-१४४ ) सिद्धौषधाचे नाव.

**यव**–पु., मान० **षट्सर्षपमितः** ( र. ११.२ ) **धान्यमाषद्वयम्** ( चक. १२.८८ ) **गुञ्जायाः षष्ठांशः** ( र.३. १२७-१२९ )
यवप्रमाण म्हणजे गुंजेचा सहावा भाग. सहा मोहऱ्या किंवा दोन उडीद म्हणजेही एक यव.
धान्य०, **गुणाः–मधुरः कषायस्तिक्तः (कटुविपाकी)** ( सुसू. ४६.४१-४२ ) **मधुरविपाकी** ( रा. १६ ) **शीतो रूक्षो गुरुः सरः ग्राही** ( रा. १६ ) **वृष्यो वातघ्नः** ( सुसू. ४६.४१-४२ ) **वातकरः कफपित्तघ्नो मेदप्रमेहपीनसश्वासकासोरुस्तम्भकण्ठामयत्वग्रोगघ्नश्च** ( ध. ६.७८ ) **स्वरवर्णकृल्लेखनस्तृषाहरः प्रसादनः** ( सुसू. ४६.४१-४२ ) **स्वेदोपगच्छर्दिनिग्रहणगणे श्रमहरगणे चैकं द्रव्यम्** ( चसू. ४.१३,१४,१६ ) **वातसंशमनवर्गे एकं द्रव्यम्** ( सुसू. ३९.७) **पुरीषजननानां श्रेष्ठः** ( असंसू. १३.३ ) **यवकल्को व्रणे प्रशस्तः** ( सुचि. १.६९ )

हिं.—जौ, जवे.
**म.—जव.**
बं.—यव.
त.—यवैक्कोतुमै, पार्लियरिचि.

जव. **गुण**— मधुर, तुरट,कडु, पचल्यावर तिखट किंवा मधुर, थंड, रूक्ष, जड, मळ घट्ट करणारे, व मल प्रवृत्ति करणारे शुक्र वाढवणारे, वातकर, कफपित्त शामक, मेद–प्रमेह–पीनस–श्वास–खोकला–उरुस्तंभ–गळ्याचे विकार–त्वचेचे विकार–यांचा नाश करणारा आहे. स्वराला आणि वर्णाला चांगले करणारे आहे. दोष खरडून काढणारे, तहान शमविणारे, प्रसन्नता वाढविणारे; स्वेदोपग, च्छर्दिनिग्रह, श्रमहरगणातील एक द्रव्य. पुरीष निर्माण करण्याचे कार्यातील एक श्रेष्ठ द्रव्य आहे. वातशामक असेही एक द्रव्य.

**–कोलकुलत्थयूष**–पु., आहारद्रव्य० **अयं कण्ठ्योऽनिलापहश्च** ( सुसू. ४६.३७५ )
जव, बोरे व कुळीथ यांचे कढण घशाला चांगले व वातनाशक.

**–क्षार**–पु., भैषज्य० ( ध. २.१७ ) **गुणाः–कटुरुष्णो रूक्षस्तीक्ष्णः सरो दीपनो रक्तदूषणः पित्तदूषणः कफवातघ्न उदरामजशूलाश्मरिमूत्रकृछ्रविषदोषघ्नश्च** ( ध. २.१७ ) **वह्निसमः शुक्रश्लेष्मविबन्धार्शोगुल्मप्लीहविनाशनः** ( सुसू. ४६.३२३ )
जवखार, यवक्षार. **गुण**— तिखट, उष्ण, रूक्ष, तीक्ष्ण, सारक, दीपन, रक्तदोषकर, पित्तदुष्टिकर, कफवातनाशक, उदर– आमजन्यशूल – अश्मरी– मूत्रकृच्छ्र– विषदोषनाशक, हा अग्नीच्या गुणाचा

आहे. शुक्र, कफ, अवष्टंभ, मूळव्याध, गुल्म आणि प्लीहाविकार नाशक आहे.

**-क्षारघृत**-न., **यवक्षारसहितं घृतम्; कासे उपयुज्यते** (चचि. १८.१६६)

यवक्षारयुक्त तूप. खोकल्यास उपयुक्त.

**-चिञ्चा**-स्त्री., **वनस्पति० 'यवेची' 'काटेधोतरा' इति प्रसिद्धा** ( र. २५.२२ ) काटेधोत्रा.

**-चित्रा**-स्त्री., **वनस्पति० क्षीरिणी, काञ्चनक्षीरी** (रा. ५.३६३)

पिसोळा, पिवळा धोत्रा, काटेधोतरा.

**-ज**-पु., **यवक्षारः** ( ध. २.१७ ) जवखार, यवक्षार.

**यवानी** ( रा. ६.१४१ ) ओवा.

न., **निर्यास० पलाशगन्धा** ( रा. ६.८८; पान ८१ ) एक प्रकारचे वंशलोचन, तवकीर, जव, गहू, तांदूळ यांच्या पिठापासून विशिष्ट प्रकाराने त्याचप्रमाणे वनगाईसारख्या प्राण्याचे दूध सुकवूनही तवकीर बनवतात. धान्यापासून करतात ते तवक्षीर व दुधापासून करतात ते तबक्षीर. ताडाच्या झाडाच्या माथ्यातील रसापासूनही करतात ते तालक्षीर. रानगाईचे तवकीर श्रेष्ठ. ते न मिळाल्यास इतर घ्यावे.

**-जा**- **निर्यास० वंशरोचना** ( ध. २.५६ ) वंशलोचन.

**-तिक्ता**-स्त्री., **वनस्पति० शङ्खिनी** ( ध. १.२५६ ) **यवक्षेत्रेषु जायते तिक्तसप्ताष्टपत्रा चेति यवतिक्तेति नाम्ना प्रथिता** ( सुसू. ४५.१२५ )

साखवेल, जवाच्या शेतात होते. कडु, सात-आठ पानांची होणारी वनस्पती.

**-तिक्तातैल**-न., **यवतिक्ताजन्यं तैलम्, गुणाः- सर्वदोषप्रशमनमीषत्तिक्तमग्निदीपनं लेखनं मेध्यं पथ्यं रसायनं च** ( सुसू. ४५.१२५ ) **रेचनं सुरभि च** ( ध. ६.१४३ )

मुंगुसवेलीचे तेल. सर्वदोषशामक, थोडे कडु, अग्निदीपक, दोष खरडून काढणारे बुद्धीला चांगले, पथ्यकर व सर्वधातु विशुद्धकर, रेचक व सुगंधी.

**-पङ्क्ति**-स्त्री., **हस्तरेखा कुमारहस्ते अच्छिन्नेयं प्रशस्ता** ( कासू. २८ )

हातावरच्या रेषा. जवाच्या रेषा. मुलाच्या हातावर या अखंड असल्या तर त्या चांगल्या.

**-पल्ल**-पु., **यवस्थापनकोष्ठी** ( सुचि. १२.१६ ) यव साठवण्याची कणगी.

**-प्रख्या**-स्त्री., **क्षुद्ररोग० कफवातोत्था मांससंश्रिता यवाकारा कठिना ग्रथिता च पिडका** (सुनि. १३.५) **चिकित्सा-एताम् आदौ स्वेदयेत् परिपाकगतां भित्त्वा व्रणवत्समुपाचरेत्** ( सुचि. २०.५-६ )

यवप्रख्या नावाचा क्षुद्ररोग. कफवातजन्य मांसाच्या आधाराने जवासारखी कठिण गाठाळ पुळी होते. ती प्रथम शेकून मग पिकल्यावर फोडून व्रणाचे उपचार करावेत.

**-फल**-पु., **वनस्पति० वंशः** ( ध. ४.१३७ ) वंश, बांबू.

**कुटजः** ( रा. ९.१९ ) कुडा.

**वंशफलः** ( असंउ. ६ इन्दु ) बांबूच्या बिया.

**-(फला)**-स्त्री., **वनस्पति० दुग्धिका** (डल्हण) ( सुक. ६.१५) दुधी.

**-फलाङ्कुर**-पु., **वनस्पति० वंशाग्रम्** (रा. ७.२१९) वेळूचा कोंब.

**-भस्मन्**-न., **भैषज्य० यवक्षारः** ( सुउ. ४३.१२ ) यवक्षार.

**-शाक**-पु., **शाक० क्षेत्रवास्तुकम्, फञ्जीचिल्ल्यादिगणे** ( चसू. २७.१८२ ) चुका.

**-शूक**-पु., **भैषज्य० यवक्षारः** ( रा. ६.२४ ) जवखार.

**-शूकज**-पु., **वनस्पति० मुण्डशालिः** (रा. १६.८९) **द्र० 'शालि'** -साळीचा प्रकार.

**यवक्षारः** ( अहसू. ६.१५० ) जवखार.

**-संभवा**-स्त्री., **वनस्पतिनिर्यास० वंशरोचना** ( ध.२ .५६ ) वंशलोचन.

**-सुरा**-स्त्री., **आसुत० गुणाः-विष्टम्भिनी गुर्वी रूक्षा त्रिदोषकृत** ( अहसू. ५.७० )

जवाची दारू. ही अवष्टंभ करणारी, जड, रूक्ष. त्रिदोषकारक आहे.

**-सूचक**-पु., **भैषज्य० यवक्षारः** ( रा. ६.२४ ) जवखार.

**-स्वेद**-पु., **स्वेद० अनग्निस्वेदः** ( असंचि. ५ ) अग्निवाचून घाम आणणे, घाम आणण्याचा एक प्रकार.

**यवक**-पु., **वनस्पति० शालिभेदः** ( ड. सुसू. ४६.४ ) **द्र० 'शालि.'** एक प्रकारची साळ.

**गोधूमः** ( ध. ६.९७ ) गहू.

**व्रीहिः** ( ध. ६.७२ ) तांदूळ.

**धान्य०** ( चसू. २७.१२ ) **अल्पयवः** (चसू. २१.२५ ) **गुर्वाहारद्रव्यम्** ( चसू. ५.११ ) **शूकधान्यानामपथ्यत्वेनाऽग्र्यतमः** ( चसू. २५.३९ ) **गुणाः-मधुरः, पाकेऽम्ल उष्णो गुरुः, स्निग्धः,**

**श्लेष्मपित्तलः, सृष्टमूत्रपुरीषश्च** ( अहृसू. ६.६-७ ) सातू शूक धान्यामधील प्रमुख धान्य. गुरु, आहार, द्रव्य, शूकधान्यामधील अपथ्यद्रव्यात श्रेष्ठ. गुण— मधुर, विपाक, अम्ल, उष्ण, गुरु, स्निग्ध, श्लेष्मा आणि पित्तवर्धक, मूत्र आणि पुरीष उत्पन्न करणारे आहे.

**यवन**–पु., **यवनदेशीयः यश्च मांसादिसात्म्यः** ( चचि. ३०.३१६ )

ग्रीकदेशीय. यवनाना मांस गहू इ० सात्म्य असतात.

**गोधूमः वनस्पति०** ( रा. १६.१५१ ) गहू.

**–द्विष्ट**–पु., **निर्यास० गुग्गुलुः** ( रा. १२.१८३ ) गुग्गुळ

**यवनाल**–पु., **वनस्पति० जूर्णा** (व. १६.१०८) जोंधळा. **धान्य० यावनालनिभः खरपत्रो नदीजो दृढत्वक्, गुणाः–ईषन्मधुरो रुच्यः शीतः पित्ततृषाघ्नः पशूनामहितश्च** ( ध. ८.३८ )

जोंधळ्याप्रमाणे ताटवा असणारे खरखरित पत्राचे नदीच्या काठी होणारे धान्य. किंचित गोड, रुचकर, शीत, पित्ततृष्णानाशक, पशूंना अहितकारक.

**पवनेष्ट**–न., **खनिज० सीसकम्** ( ध. ६.२१ ) शिसे.

**मरिचम्, वनस्पति०** ( ध. २.८८ ) मिरे.

**गृञ्जनम्** ( रा. ७.५५ ) गाजर.

**लशुनः** ( रा. ७.९६ ) लसूण.

**पलाण्डु० राजपलाण्डुः** ( रा. ७.१०३ )

श्रेष्ठ जातीचा कांदा.

**पलाण्डुः** ( ध. ४.७१ ) कांदा.

**( यवनेष्टा )**–स्त्री., **वनस्पति० खर्जूरी** ( रा. ११.६५; पान. १७८ ) खजुरीचे झाड.

**यवस**–पु., **वनस्पति० बुसम्** ( सुसू. ३४.५ )

घोडे इत्यादींना मारक एक प्रकारचे गवत.

**यवसाह्व**–पु., **वनस्वति० यवानी** ( ध. २.९१ ) ओवा.

**यवागू**–स्त्री., **आहारद्रव्य०** ( सुउ. ४०.९२ ) **तण्डुलादिकृता पेया** ( चचि. ३.१४२ ) **' यवागूर्विरलद्रवा '** ( सुसू. ४६.३४५ ) **यवागूं षड्गुणे जले पचेत्** (ड. सुसू. ४६.३४५)

यवागू, पेज; सातू किंवा तांदूळ सहापट पाण्यात घालून उकळून केलेली.

**यवाग्रज**–पु., **भैषज्य० यवक्षारः** ( चचि. २६.६४ ) जवखार.

**यवानीक्षुपः** ( चचि. २६.६४ ) ओव्याचे झाड.

न., **भैषज्य० तुषोदकम्** ( ध. ६.२५१ )

जवाचे विधियुक्त आंबवलेले पाणी.

**वनस्पति० यवानी** ( ध. २.९१ ) ओवा.

**यवाङ्कुर**–पु., **यवस्याङ्कुरो मन्त्रकर्मण्युपयुज्यते** ( असंसू. ८ ) यवाचे अंकुर. मंत्रकार्यात उपयोगी.

**यवाढक**–न., **मान० चतुष्षष्टिपलानि** ( सुउ. ५२.४३ )

प्रमाण ६४ पळे.

**यवानक**–पु., न., **वनस्पति० यवानी** ( असंचि. ८ ) ओवा.

**( यवानिका )**–स्त्री., **वनस्पति० यवानी** ( ध. २.९१ ) ओवा.

**यवानी**–स्त्री., **वनस्पति० गुणाः–कटुस्तिक्तोष्णा दीपनी वातकफघ्नी शूलाध्मानार्शःकृमिच्छर्दिघ्नी गुल्मोदरनाशिनी च** ( ध. २.९३ ) **पाचनी लघुस्तीक्ष्णा पित्तला शुक्रप्लीहानाहनाशिनी च** ( र. १६.५६ ) **हृद्याऽऽस्वादनीयपित्तोत्क्लेशकरी च** (चसू.२७.१७०) **दौर्गन्ध्यनाशिनी** ( चसू. २७.३०७ )

हिं.—अजवाइन, अजमान.

**म.—ओवा.**

गु.—अजमो.

बं.—यमानी योयान.

त.—अमन.

फा.—नानुखा.

ओवा, तिखट, कडू, उष्ण, दीपन, वातकफनाशक, शूल, आध्मान, अर्श, कृमि, ओकारी यांचा नाश करणारा आहे. गुल्म उदरनाशक आहे. पचावयास हलका, तीक्ष्ण, पित्तवर्धक, शुक्र, प्लीहा, आनाह नाशक आहे. हृद्य असून रुचि उत्पन्न करणे, पित्ताचा उत्क्लेश करणे हेहि ओव्याकडून घडते, दुर्गंधनाशक.

**यवानीभेदः तुरुष्काऽऽरुया** ( ध. २.९४ ) **गुणाः— रूक्षा ग्राहिणी मदकारिणी कटुः** ( ध. २.९४ )

ओवाप्रकार. **गुण**—रूक्ष, मळ बांधणारी, माज आणणारी.

**यवानीभेदः तुरुष्काऽऽख्या** ( ध. २.९४ ) **गुणाः— रूक्षाग्राहिणी मदकारिणी कटुः** ( ध. २.९४ )

ओवाप्रकार, **गुण**—रूक्ष, मळ बांधणारी, माज आणणारी.

**–षाडव**–न., **योग० यवानीतिन्तिडीकनागराम्लवेतसदाडिमबदरवृक्षाम्लानि कर्षप्रमाणानि धान्यसौवर्चलाजाजीवराङ्गान्यर्धकर्षप्रमाणानि पिप्पलीनां शतं मरीचानां द्वे शते शर्करायाः**

**चत्वारि पलान्येकत्र चूर्णयेत्। गुणाः–जिह्वाविशोधनं हृद्यं हृत्प्लीहपार्श्वशूलघ्नं रोचनं विबन्धानाहनाशनं कासश्वासहरं ग्राहि ग्रहण्यर्शोविकारनुत्** ( चचि. ८.१४१-१४४ )

यवानीषाडव नावाचे चूर्ण. या चूर्णात (१) ओवा (२) चिंच (३) सुंठ (४) अम्लवेतस (५) दाडिम (६) बोर (७) कोकमसाल १।१ तोळा घ्यावी. त्यात धने, सौवर्चल, जिरे, अर्धा तोळा. पिंपळचा १०० नग. मिरी २०० नग. आणि साखर १६ तोळे, ही औषधे कुटून एकत्र करावी. हे चूर्ण जिव्हाविशोधन, हृदयाला हितकर, प्लीहा पार्श्वशूल नाशक, रुचि उत्पन्न करणारे, विबंध, आनाहनाशक, कास–श्वास नाशक, संग्राहि आहे. ग्रहणी अर्श विकार नाशक आहे.

**यवान्नविकृति**–स्त्री., **यवकृतान्नविशेषः** ( सुउ. ३९०.२७० ) जवाच्या अन्नाचा प्रकार.

**यवापत्य**–न., **भैषज्य० यवक्षारः** (रा. ६.२४) जवखार.

**यवापूप**–पु., **आहारद्रव्य० यवकृतोऽपूपः** (चसू. २७.२६५)

जवाचे अनारसे, पोळी, भाकरी, पुरी.

**यवाम्लज**–न., **भैषज्य० तुषोदकम्** ( रा. १५.२९७ ) जवाचे विधियुक्त आंबवलेले पाणी.

**यवालक**–पु., **पक्षि० यवगुडुरुकः विष्किरवर्गीयाणामेकतमोऽयम्** ( सुसू. ४६.५९ )

यवालक नावाचा पक्षी. उकरून भक्ष्य वेचणारा पक्षी.

**यवास**–पु., **वनस्पति० यासः** (चचि. ४.६८) धमासा.

**–शर्करा**–स्त्री., **वनस्पति० यासशर्करा** ( सुसू. ४५.१६७ ) धमाशाची साखर.

**यवासक**–पु., **वनस्पति० यासः** ( ध. १.२२ ) धमासा.

**यवाह्व**–पु., **भैषज्य० यवक्षारः** ( सुचि. २०.१९,२० ) जवखार.

**यवोत्थ**–न., **भैषज्य० तुषोदकम्** ( ध. ६.२५१ ) जवाचे विधियुक्त आंबवलेले पाणी.

**यवौदन**–पु., **यवकृताहारः** ( सुउ. १७.४९ ) जवाचा भात. जवाचा खाण्याचा पदार्थ.

**यव्य**–पु., **भैषज्य० यवक्षारः** ( ध. २.१७ ) जवखार.

**यशस्**–न., **निर्मलगुणकीर्तनम्** ( सुसू. ३४.१३ ) यश, निर्दोष गुणांचे वर्णन.

**–करी**–स्त्री., **वनस्पति० जीवन्तीभेदः बृहज्जीवन्ती** ( रा. ३.१७९ ) **द्र० ' जीवन्ती '** हरिणदोडीचा प्रकार.

**जीवन्ती** ( ध. १.१४० ) हरिणदोडी.

**यवतिक्ता** ( रा. १.२५६ ) मुंगुसवेल.

**–विनी**–स्त्री., **वनस्पति० यवतिक्ता** ( रा. ३.३८१ ) मुंगुसवेल.

**वनस्पति० तेजस्विनी** ( रा. ३.३९४ ) मालकांगोणी.

**( यशो )–द्**–पु., **खनिज० पारदः** ( र. १.२-५ )

**ग्रहमातृ०** ( असंउ. ४ ) पारा.

**–धन**–पु., **सप्तविंशतिरससिद्धिप्रदायकेष्वेकः** ( र. १.२-५ ) सत्तावीस रससिद्धांपैकी एक.

**यशस्या**–स्त्री., **वनस्पति० ऋद्धिः** (रा. ५.१८७) ऋद्धि, अष्टवर्गांपैकी एक.

**जीवन्ती** ( रा. ३.१७७ ) हरिणदोडी.

**यष्टि**–स्त्री., **वनस्पति० भार्ङ्गी** ( रा. ६.९६ ) भारंगमूळ.

**–कर्ण**–पु., **पञ्चदशकर्णबन्धेष्वेकः** ( सुसू. १६.१० ) **सच ग्रथितमांसस्तब्धसिरासन्ततसूक्ष्मपालियुक्तः** ( सुसू. १६.१० )

यष्टिकर्ण या नावाचा कानाचा बंध आणि विकार. गाठळलेले मांस, ताठरलेल्या शिरा, पसरलेला व बारीक पाळी असलेला.

**–मधुकान्वितघृत**–न., **यष्टिमधुमिश्रं घृतम्, व्रणे वेदनाशमनार्थमुपयुज्यते** ( सुसू. ५.४२ )

जेष्ठमध आणि तूप, व्रणावर वेदना शामक म्हणून उपयोग करतात.

**–मार्कव**–पु., **नलिका–भृङ्गराजः** ( असंउ. २८ ) माका.

**–लता**–स्त्री., **वनस्पति० भ्रमरारिः** ( रापरि. १०.४१ ) भुंगा मारणारी वनस्पती माळव्यात प्रसिद्ध.

**यष्टिक**–पु., **वनस्पति० यष्टीमधु** ( चसू. ४.१४ ) ज्येष्ठमध.

**( यष्टिका )**–स्त्री., **प्रतुदपक्षि०** ( चसू. २७.५२ )

**यष्टिका**–स्त्री., भक्ष्य टोचून खाणारा एक पक्षी.

**–भ्रामण**–न., **यन्त्रयष्ट्यादिना भ्रामणम्, जलशीतीकरणानामेकतममिदम्** ( सुसू. ४५.१९ )

पाणी थंड करण्याचा एक प्रकार. यंत्र, काठी इत्यादी गरगर किंवा झोके देऊन फिरविणे.

**यष्टी**–स्त्री., **वनस्पति० यष्टीमधु** ( ध. १.१४२ ) जेष्ठमध.

**–मधु**–न., **वनस्पति० गुणाः– मधुरमीषत्तिक्तं शीतं वृष्यं चक्षुष्यं रुच्यं पित्तघ्नं शोषक्षयविषच्छर्दितृष्णा-**

**व्रणघ्नं च** ( ध. १.१४२ ) **मेध्यरसायनप्रयोगेऽस्य चूर्णं क्षीरेण सहोपयुज्यते** ( चचि. १(३).३४ )
हिं.—मुलहटी, मीठी लकरी, मुलैठिका.
**म.—ज्येष्ठमध, जेष्ठमध.**
गु.—जेठीमधनो मूळ.
फा.—वेखमेहेकूमझु.
जेष्ठमध, गोड, किंचित कडू, शीत, वृष्य, चक्षुष्य, रुचिकर, पित्तशामक, शोष, क्षय, विष, ओकारी, तहान, व्रणनाशक आहे. बुद्धिवर्धनासाठी आणि रसायनविधीमध्ये याचे चूर्ण दुधाबरोबर देण्यासाठी उपयोगात आणतात.

**–मधुक**–न., **वनस्पति० यष्टीमधु** ( सुउ. ४५.२४ )
ज्येष्ठमध.

**–मधुकपायस**–न., **आहारद्रव्य० यष्टीमधुकसाधितक्षीरसिद्धास्तण्डुलाः यष्टीमधुकान्वितं पायसं वा** ( सुउ. ५३.१३ )
ज्येष्ठमधसिद्ध दुधात शिजवलेला भात. ज्येष्ठमध आणि तांदूळ यांच्या पासून केलेली दुधातील खीर.

**यष्टीक**–न., **वनस्पति० यष्टीमधु** ( ध. १.१४२ )
ज्येष्ठमध.

**यष्टृ**–वि., **यज्ञकर्ता** ( चसू. ८.१८ ) यज्ञकर्ता.

**यष्ट्याह्व**–न., **वनस्पति० यष्टीमधु** ( ध. १.१४२ )
ज्येष्ठमध.

**यस्यश्यावनिमित्तीय**–वि., **यस्य श्यावरूपमधिकृत्य कृतोऽध्यायसंज्ञाविशेषः** ( चइ. ९.१ )
या नावाचा अध्याय, यात मरणदर्शक चिन्हे आहेत.

**याक्षसत्त्व**–न., **चित्तप्रकृतिः, राजससत्त्वभेदः, दानशय्याऽत्यलङ्कारपानभोजनमैथुनैर्नित्योपेतं प्रमुदितम्** ( कासू. २८ )
राजसप्रकृतीचा प्रकार, दान, शय्या, पुष्कळ अलंकार, पान, भोजन, मैथुन यात नित्य आनंद असणारा

**याचनक**–पु., **वनस्पति० एरण्डभेदः रक्तैरण्डः** ( रा. ८.४४७ ) **द्र० 'एरण्ड'** लाल एरण्ड.

**याज्ञिक**–पु., **वनस्पति० पलाशः** ( ध. ५.१६१ ) पळस.
**पिप्पलः** ( रा. ११.११८ ) पिंपळ.
**खदिरभेदः, ताम्रकण्टकः** ( रा. ८.३६ ) **द्र० 'खदिर'** खैर.

**–समय**–पु., **याज्ञिकसिद्धान्तः, पूर्वमीमांसाशास्त्रीयसिद्धान्तः** ( चवि. ८.५४ )
यज्ञात करावयाच्या गोष्टींचे संकेत.

**यातुक**–पु., **शाक० शुक्ला शाकपर्णी, फञ्जीचिल्ल्यादिगणे प्रोक्तेयम्** ( चसू. २७.१०२ )
भाजीचा प्रकार. फंजी चिल्ली इत्यादीपैकी.

**यातुघ्न**–पु., **निर्यास० गुग्गुलुः** ( रा. १२.१८४ )
गुग्गुळ.

**यात्राकर**–वि., **यापनाकरम्** ( चसू. १८.३९ )
कालक्रमण करणारा.

**यादृच्छिक**–वि., **यदृच्छया नाम स्वैरतया स्वच्छंदं वा कर्म कुर्वन्** (चसि. २.५) स्वच्छंदाने काम करणारा.

**यान**–न., **गमनम्** ( सुसू. ४६.४९० ) जाणे.
**वाहनम्** ( सुसू. २.१० ) वाहन.

**–क्लान्त**–वि., **यानेन रथादिना क्लान्तः** ( चसि. २.१४ )
रथ वगैरे वाहनाने, प्रवासाने थकलेला.

**–यान**–न., **यानेन गमनम्** ( अहसू. १६.२७ )
वाहनाने जाणे.

**यान्त्रिक**–वि., **यन्त्रपीडितः** ( चसू. २७.२३७ )
यंत्रातून दाबून ( पिळून ) काढलेला.

**यान्त्रिकेक्षुरस**–पु., **यन्त्रपीडित इक्षुरसः, गुणाः–गुरुर्विदाही विष्टम्भी** ( सुसू. ४५.१५८ )
यन्त्राने काढलेला उंसाचा रस. **गुण**—जड, विदाह अवष्टंभ करणारा.

**यापन**–वि., **धारणम्** ( सुनि. १.१२ ) धारण.
**पोषणम्** ( सुसू. १४.३ ) पोषण.
**रोगशमनम्** ( सुचि. ६.१३ ) रोगशमन.

**–बस्ति**–पु., **निरूहबस्ति०** ( सुचि. ३५.१८ ) **क्लैब्ये उपक्रमविशेषः** ( चचि. ३०.२०३-२०४ ) **अतियोगे लक्षणम्– शोफाग्निनाशपाण्डुताशूलार्शःपरिकर्तिकाज्वरातिसाराः** ( चसि. १२.३०-३१ ) **तत्र वर्जनीयम्–व्यायामो मैथुनं मद्यं शिशिराम्बु संभोजनं रथक्षोभो मधु च** ( चसि. १२.२३ )
शोधक बस्ति. नपुंसकत्वावर एक उपचार. अतिप्रमाणात उपयोग केल्यास सूज, अग्निनाश, पांडु, शूळ, मूळव्याध, मुरडा, ज्वर, अतिसार ही होतात. यात व्यायाम, संभोग, दारू, थंड पाणी व अन्न, मध व वाहनाचा त्रास वर्ज्य.

**यापनीय**–वि., **याप्यः** ( सुसू. २३.१० )
औषधोपचार व पथ्य आहे तो पर्यंत बरा असणारा.

**याप्य**–वि., **असाध्यम्, 'याति नाशेषतां व्याधिरसाध्यो याप्यसंज्ञितः'** ( चचि. ८.३४ ) **आयुषः शेषत्वा-**

दसाध्योऽपि पथ्यसेवया लब्धाल्पसुखो व्याधिः (चसू. १०.१७)

आयुष्य शिल्लक असल्यामुळे असाध्य असून ही व्याधि पथ्य केल्याने थोडा कमी होऊन सुख लाभते. या रोगी अवस्थेस याप्य म्हणतात.

**-ता**-स्त्री., कृच्छ्रसाध्यता (सुसू. ४.५)
कष्टसाध्यता.

**याम**-पु., प्रहरः (र. ३.२९) प्रहर ३ तास.

**यामिनी**-स्त्री., रात्रिः (सुचि. २६.८) रात्र.

**यामुन**-न., खनिज० अञ्जनम् (रा., १३.२१४) सुरमा.

**यामुनेय**-न., खनिज० अञ्जनम् (रा. ३.१५१) सुरमा.

**याम्य**-वि., दाक्षिणदिग्देशीयम् (र. ७.३)
दक्षिणदिशेचा.

न., नक्षत्र० भरणी (सुक. ३.३८) भरणी नक्षत्र.

शुद्धसत्त्वप्रकारः (चशा. ४.३७(४)) लेखास्थवृत्तः प्राप्तकारी स्मृतिमानसंप्रहार्यउत्थानवानैश्वर्यवान् व्यपगतरागेर्ष्याद्वेषमोहश्च याम्यः (चशा. ४.३७(४)

शुद्ध सात्विक प्रकृतीचा प्रकार. मर्यादा ओळखून वागणारा, प्राप्त कर्तव्य न चुकता करणारा, स्मृतिमंत, निवारण करता येत नाही असा, उठावाने काम करणारा, ऐश्वर्यवान, ज्याची आसक्ति व मत्सर-द्वेष-मोह हे नाहीसे झाले आहेत असा.

सन्निपातज्वरभेदः वातहीनकफमध्यपित्ताभिवृद्धिजः द्र० 'ज्वर' (काकविशेषकल्क)
सन्निपात ज्वराचा प्रकार. वात कमी. कफ मध्यम व पित्त अधिक असलेला संनिपात ज्वर.

**(याम्या)**-स्त्री., भरणीनक्षत्रम् (असंउ. ४१)
भरणी नक्षत्र.

रेवतीग्रह० साऽष्टमे दिनेऽपत्यं विनाशयति (कारेवती. ४६)

रेवतीस्त्रीग्रह. आठव्या दिवशी बालकाला मारते.

**याम्योद्भूत**-पु., वनस्पति० श्रीतालः (रा. ९.९५)
एक प्रकारचा ताड.

**यायावर**-वि., गमनशीलः, नैकत्र कृतावस्थितिकत्वात् आभीक्ष्ण्येन विचरणशीलः (चचि. १(४).३)
हालचालीचा स्वभाव असणारा. अस्थिर.

**याव**-पु., यवपृथुकः (चसू. २७.२७३) जवाचे पोहे.

**(यावी)**-स्त्री., वनस्पति० शङ्खिनी (रा. ३.३८१)
सांखवेल.

**-शर्करा**-स्त्री., भैषज्य० यवासशर्करा (ध. २.१०७)
धमाशाची साखर.

**-शाक**-न., शाक० केचिच्छङ्खिनीमाहुः (असंसू. ७)
शंखिनी नांवाची शाकभाजी. सांखवेल.

**-शूक**-पु., भैषज्य० यवक्षारः (सुचि. १.४०)
जवखार.

**-शूकज**-पु., भैषज्य० यवक्षारः (ध. २.१७)
जवखार.

**यावक**-वि., यवकृतः (चइ. १२.७२) घृतमिश्रं यवकृतं तर्पणम् अन्न० (चचि. ८.६५)
तूप घातलेली जवाची पेज.

**यावन**-पु., वनस्पति० तुरुष्कः (ध. ३.२२)
धूप, ऊद.

**(यावनी)**-स्त्री., वनस्पति० यवानी (ध. २.९४)
ओवा.

इक्षुभेदः करङ्कशालिः (रा. १४.१८५) द्र० 'इक्षु'
उंसाचा प्रकार.

**-प्रिया**-स्त्री., वनस्पति० नागवल्ली (धपरि. ३.२)
विड्याचे पान.

**यावनाल**-पु., वनस्पति० गुणाः- ईषन्मधुरः शीतो रुच्यः पित्तघ्नः पित्ततृषाघ्नश्च (रापरि. ८.३८)
जोंधळ्याचा दांडा, जोंधळ्याचा ताटवा. किंचित मधुर, शीत, रुच्य, पित्तशामक, पित्ततृष्णा शामक आहे. जूर्णः (रा. १६.१६७) जोंधळा.
यवक्षारः (सुउ. १५.११,१२) जवखार.

**(यावनाला)**-स्त्री., वनस्पति० जूर्णा (ध. ६.१०८)
जोंधळा.

**(यावनाली)**-स्त्री., शर्कराभेदः 'हिमजा' 'गुडजा' इति प्रसिद्धा, गुणाः-स्वादुस्तिक्ताल्पोष्णा पिच्छिला सारिका रुच्या दाहकरी रक्तविकारकरी वातघ्नी च (रा. १४.१६३) द्र० 'शर्करा'
एक साखरेचा प्रकार. **गुण**—गोड, कडु, अल्प उष्ण, बुळबुळीत, रुचिवर्धक, दाह करणारी, रक्त विकार उत्पन्न करणारी, वातनाशक आहे.

**-जभस्मन्**-न., भैषज्य० यवक्षारः (सुउ. ४२.४०-४४) जवखार.

**यास**-पु., वनस्पति० धन्वयासः (ध. १.२२) धमासा.

**-शर्करा**-स्त्री., दुरालभाक्वाथकृता शर्करा, सतिक्ता कषायमधुरा शीता च (चसू. २७.२४१)
धमाशाची साखर, धमाशाचा काढा करून केलेली साखर, कडु, तुरट, गोड, शीत आहे.

**युक्त**–वि., **निपुणः** ( सुसू. ३४.२४ ) हुशार, निपुण.
**( युक्ता )**–स्त्री., **वनस्पति० रास्ना** ( असंसू. १५.४९ ) रास्ना.
**–मात्र**–वि., **योग्यप्रमाणम्** ( सुसू. ३४.२२-२३ ) योग्य प्रमाणाचे.
**–रथ**–पु., **निरूहबस्ति०, रथेषु युक्तेषु हस्त्यश्वे कल्पिते वा यो बस्तिर्दातुं शक्यते स युक्तरथो बस्तिः** (सुचि. ३८.११५) **तत्रैरण्डमूलक्वाथमधुतैलसैन्धव–वचापिप्पलीफलानि द्रव्याणि** ( सुचि. ३८.११५ ) युक्तरथबस्ति. निरुहबस्तीचा प्रकार. रथात, घोड्यावर, हत्तीवर बसून जाणाराने ही घेण्यास योग्य. माधुतैलिकाचे एक नाव. त्यामध्ये एरंडमूल क्वाथामध्ये तेल–सैंधव–वेखंड, पिंपळी घालून दिला जातो.
**–रसा**-स्त्री., **वनस्पति० रास्ना** (ध.१.२७०) रास्ना.
**–सेन**-वि., **युक्ता सज्जा सेना यस्य सः** (सुसू. ३४.३) ज्याची सेना सज्ज आहे असा.
**–सेनीय**-वि., **युक्तसेनमधिकृत्य कृतोऽध्यायसंज्ञाविशेषः** ( सुसू. ३४.१ ) अध्यायाचे नाव. यात राजाच्या रक्षणाचे उपाय आहेत. अन्नसंरक्षण परीक्षा इत्यादी.
**–स्नेह**-वि., **अल्पस्नेहः** ( ड. सुचि. ३७.५६ ) थोडासा स्नेह.
**युक्तार्थ**–पु., **युक्तः प्रमाणोपपन्नः अर्थः** (सुउ.१.७) योग्य व आधाराला धरून केलेला सुयोग्य अर्थ.
**युक्ति**–स्त्री., **तन्त्रयुक्तिः** ( सुउ. १.७ ) तंत्र ( ग्रंथ, शास्त्र ) लावण्याची पद्धत.
**प्रमाण०** ( चसू. ११.२५ ) **बहुकारणयोगजभावस्य त्रिकालसाधकं ज्ञानम्** ( चसू. ११.७ ) कार्याच्या कारणसामग्रीचे ज्ञान म्हणजे युक्ति किंवा प्रमाण.
**योजना** ( चचि. २४.६९ ) योजना.
**अविनाभावरूपः सम्बन्धः** ( चवि. ४.४ ) स्वभावसिद्ध संबंध.
**योगः** ( चसू. ५.७ ) योग.
**उपायः** ( चसू. २६.१२ ) उपाय.
**–ज्ञ**–वि., **युक्तिं योगं जानाति इति योगज्ञः** ( चचि. ३.२५४ ) योग जाणणारा, वैद्य.
**–दर्शन**–न., **उपपत्तिदर्शनम्** ( चवि. ८.३ ) शास्त्रीयसिद्धांताचे कार्यकारणभाव विवेचन, उपपत्ति सांगणे.
**–भृष्ट**–वि., **ईषद्भृष्टम्** ( चसू. २७.३१० ) थोडेसे भाजलेले.
**–युक्त**–पु., **वनस्पति० तुरुष्कः** (ध.३.२३) धूप, ऊद.
**–विशेष**–पु., **योजनाविशेषः** ( सुसू. ४१.५ ) युक्तिविशेष.
**–व्यपाश्रय**–वि., **युक्तिर्योजना योगो वा एव व्यपाश्रयः यस्य तद्** ( चचि. ८.८७ ) युक्ति, योजना किंवा योग हीच ज्याचा आश्रय. तो.
**युग**–न., **पञ्चसंवत्सरात्मकः कालः** ( सुसू. ६.९ ) **कृतत्रेताद्वापरकलिनामानः क्रमेण सत्त्वरजस्तमस्स्वभावाश्चत्वारः कालाः** ( काशा. ) पांच वर्षाचा काळ; कृत, त्रेता, द्वापर, कलि हे काल. हे क्रमाने सत्व, रज, तम, स्वभावाचे काल होत.
**ऋद्धिः वनस्पति०** ( ध. १.१४५ ) ऋद्धि, अष्टवर्गापैकी.
**–( युग )–षट्क**–न., **आदियुगं देवयुगं कृतयुगं त्रेतायुगं द्वापरयुगं कलियुगं चेति षड्युगानि, तत्र युगभेदेन शरीरस्वरूपभेदः–कृतयुगे नारायणं नाम देहिनां संहननं शरीरमुत्पद्यते। तस्य घनं निष्कपालं शिरोऽस्थीनि च सत्त्वास्पदान्याकृतयो वज्रगरीयस्यः, हृदि चास्य महाशिरा दशैव, त्वगस्य शिरश्चाभेद्यमच्छिद्रं सर्वतोऽस्य शुक्रं, योजनं चोत्सेधः सप्तरात्रं चास्य गर्भवासः, सद्योजातस्य चास्य सर्वकर्माणि शक्यानि, न चास्य क्षुत्पिपासाश्रमग्लानिशोकभयेर्ष्याऽधर्मचिन्ताव्याधिजरा बाधन्ते, नच स्तन्यवृत्तिर्भवति, धर्मज्ञानविज्ञानतपस्स्थितियुक्तयश्च भवन्ति। तस्य पलितोपमार्धमायुरुत्कृष्टमाहुः। अथ त्रेतायामर्धनारायणं नाम देहिनां शरीरमुत्पद्यते। तस्यैकास्थिप्रायं शरीरमाकुञ्चनप्रसारणवर्ज्यं गर्भवासोऽष्टमासिकः स्तन्यजीविका च द्वे शिरःकपाले पार्श्वयोरेकैकः संधिरुरसि च, त्र्यस्थि पृष्ठं, कोष्ठस्य सिरा विंशतिः, शुक्रं च पलितोपम (?) चतुर्भागमायुरुत्कृष्टं पूर्वाचार्धगुणावसर्पणमिति। अथ द्वापरे कौशिकसंहननं शरीरमुत्पद्यते केशमात्राणुसुषिरास्थि अतिक्षिप्तसंधिर्महाहस्तिबलः सिरानुवेष्टितगात्रं गात्रसन्धिष्वस्य शुक्रं पलितोपमा (?) ष्टभागमायुरुत्कृष्टं पूर्वाचार्धगुणावसर्पणमिति। अथ कलियुगे प्रज्ञप्तिपिशितं संहननं शरीरमुत्पद्यते। पृथग्दन्तजन्म दशमासं गर्भवासः संवत्सरादूर्ध्वं प्रतितिष्ठति वाचं च विसृजति व्याध्याबाधानां बाहुल्यं च** ( काशा. )

सहा युगे. १) आदियुग २) देवयुग ३) कृतयुग ४) त्रेतायुग ५) द्वापरयुग ६) कलियुग. युगभेदाप्रमाणे शरीर स्वरूपभेद असतो. **कृतयुगामध्ये** नारायण नामक मानवी शरिराचे संहननात्मक स्वरूप होते. म्हणजे त्यावेळी मानवीशरिरातील शिर फार घट्ट होते. त्यावर कपालास्थीचे आवरण नव्हते. तशी सर्व हाडेही होती. शरिराची आकृति सत्वशील व वज्रासारखी कठोर होती. हृदयामध्ये दहा महासिरा होत्या. त्याची त्वचा आणि डोके अभेद्य अछेद्य होती. याचे सर्व शरिरात शुक्र होते. शरिराची उंची एक योजनाइतकी होती. सात दिवस गर्भवास होता. जन्मतःच सर्व कामे करण्यास तो समर्थ होता. भूक, तहान, श्रम, ग्लानि, शोक, भय, ईर्ष्या, अधर्म, चिंता, शारीरिक व मानसिक व्याधि आणि जरा यांचा त्याला त्रास नव्हता. जन्मतः त्याचे जीवन दुधावर नव्हते. धर्म, तप, ज्ञान, विज्ञान, स्थिरवृत्ति आणि योजनाचातुर्य जन्मतःच होते. त्यांचे जीवित पलितोपमार्ध प्रमाण (?) होते. **त्रेतायुगात**— अर्ध नारायण नामक मानवी शरिराचे स्वरूप होते. याचे शरीर संपूर्ण एकाच हाडाचे होते. त्याला आकुंचन किंवा प्रसरण या क्रिया नव्हत्या, आठ महिने गर्भामध्ये असे. दुधावर जीविताची वाढ होणारा हा प्राणी असे. याचे डोक्याचे दोन भाग (कपाल) असत. पार्श्व आणि छाती यांचे मध्ये एक एक संधि होता. पाठ तीन हाडांची होती. कोष्ठामध्ये वीस सिरा होत्या. शुक्रहि कोष्ठामध्येच होते. जीवनमान पूर्वीच्या मानाने निम्याने होते.

**द्वापर युगातील मानव**—केसाळ शरिराचा होता. त्याची हाडे केसासारखी बारीक व पोकळ अशी असत. सांधे दूरदूर होते. तो हत्तीसारखा बलवान होता. सारे शरीर सिरांनी व्याप्त होते. याचे जीवनमान ⅛ पलिताइतके त्रेतायुगातील पुरुषाहून याचे गुणधर्म निम्मे होते. **कलियुगामध्ये**—मांस जमलेले असे शरीर मानवाचे उत्पन्न होऊ लागले. दांत वगैरे स्वतंत्र उत्पन्न होऊ लागले. १० महिने पर्यंत गर्भवास अशी स्थिती प्राप्त झाली. १ वर्षाचे शरीर उठू बसू लागले. वाचाहि उत्पन्न झाली. व्याधीची बाधा शरिराला होऊ लागली.

**युगन्धरा**–स्त्री., वनस्पति० **जूर्णा** ( ध. ६.१०८ ) जोंधळा.

**युगपत्**–अव्य० **एककालम्** ( सुनि.१.२१ ) एकदम.

**युगलाक्ष**–पु., वनस्पति० **बर्बुरः** ( रापरि. ८.१२ ) बाभूळ.

**युग्म**–वि., **समसंख्याकम्** ( चशा. ८.५ ) सम आकडे. **पर्वसंधिः** ( चसि. ३.२९ ) पेराचे सांधे. **युगलम्** ( सुशा. ३.३४ ) जोडी.

**–पत्र**–पु., वनस्पति० **कोविदारः** ( रा. १०.२९४ ) कांचनार.

**–फला**–स्त्री., वनस्पति० **इन्दीवरी** ( रापरि. ३२७ ) मंजरी येणारी, लांब देठाची, जोड फळाची वनस्पती. **वृश्चिकाली** ( रापरि. ९.९ ) विंचवी, मेढशिंगी.

**–शुक्र**–न., **नेत्रकृष्णभागगतं सव्रणं शुक्रयुगलम्** ( सुउ. ५.५ )
डोळ्याच्या काळ्या बुबुळावर व्रणयुक्त जो शुक्रविकार. त्या विकाराचे नाव शुक्र. दोन व्रण असणे म्हणजे शुक्रयुग्म. ( हे असाध्य असते ).

**युवति**–स्त्री., वनस्पति० **नवमालिका** ( चचि. १.५८ ) नवमालिका.

**युवतीष्टा**–स्त्री., वनस्पति० **सुवर्णयूथा** ( रा. १०.१५१) सोनजुई.

**युवानपिडका**–स्त्री., क्षुद्ररोगः **यूनां मुखे भवाः कफमारुतरक्तजाः पिडका मुखदूषिकाः शाल्मलीकण्टका युवानपिडका वेति ख्याताः** ( मानि. )
क्षुद्ररोगांपैकी एक; तारुण्य पिटिका, मुर्मी, तारुण्यात तोंडावर कफवातरक्तापासून पुटकुळ्या निर्माण होतात. त्या दाबून फोडल्या असतां शेवरीच्या काट्यासारखा खीळ बाहेर पडतो.

**यूक**–पु., कीट० ( चइ. २.२१ ) **केशकीटः स्वेदजः** ( सुचि. २७.८ ) **बाह्यकृमि०** ( असंनि. १४ ) **बहिर्मलजः** ( चसू. १९.४-९ ) **अणुस्तिलाकृतिर्बहुपादयुक्तः–कृष्णः शुक्लो वा, तस्य स्थानं केशश्मश्रुलोमपक्ष्मवासांसि** ( चचि. ७.१० )
ऊ. उवा. बारीक तिळाच्या आकाराची बरेच पाय असणारी काळी किंवा पांढरी ऊ असते. ह्या उवा डोक्याचे व दाढीचे केस, अंगावरची लव, पापण्या आणि वस्त्रामध्ये वाढतात. घामापासून प्राधान्याने होतात.

**मान० षड् लिक्षाः एका यूका** ( र. ११.१ ) प्रमाण, सहा लिखा म्हणजे एक ऊ.

**यूथिका**–स्त्री., **वनस्पति० पुष्पलता०** ( ध. ५.१४८ )
**गुणाः–मधुरा ( कषाया )** ( असंसू. ७ ) **शीता सुगन्धिः पित्तघ्नी शर्करापित्तदाहतृषात्वग्दोषघ्नी च** ( ध. ५.१४८ )
हिं.—जाति.
**म.—चमेली.**
गु.— चमेली.
बं.—चमेली.
त.—मल्लिगइ.
चमेली. गुण–गोड, तुरट, थंड, सुगंधी, पित्तनाशक, पित्त-दाह-तहान त्वचेचे विकार व लघ्वीतील रेती नाशक.

**यूप**–न., **वनस्पति० तूलम्** ( ध. ५.६४ )
तुतीचे फळ.

**–द्रुम**–पु., **वनस्पति० खदिरभेदः ताम्रकण्टकः** (रा. ८.३६ ) द्र० **'खदिर'**
खैराचा प्रकार.

**यूपक**–पु., न., **वनस्पति० तूलम्** ( ध. ५.६४ )
तुतीचे फळ. सुरूप निळ्या देठाच्या सुंदर फुलांची मऊ गाभा असलेली वनस्पती.

**यूष**–पु., **धान्यादिक्वाथः** ( चसू. १३.२२ ) **आहारद्रव्य० मुद्गमसूरचणकादिकृतः** ( सुउ. ४०.२७ )
**गुणाः–रोचनो दीपनो वृष्यः स्वरवर्णबलाग्निकृत् प्रस्वेदजननस्तुष्टिपुष्टिसुखप्रदः** (काखिल.४.१५-१७)
**भेदाः–मुद्गयूषो विरसिकायूषो दाडिमयूषश्चित्रकयूष आमलकयूषः पञ्चकोलयूषो धान्ययूषः कुलत्थयूषः फलयूषः पुष्पपत्रयूषो वल्कयूषः पल्लवयूषो महायूषो रास्नायूषश्चाङ्गेरीयूषो मूलकयूषः पुनर्नवायूषोऽतिबलायूषो गुडकाम्बलिकायूषस्त्रिकटुयूषो लशुनयूषो वास्तुकयूषश्च** ( काखिल. ४.१९-२३ )
कढण, सार, मूग, मसूर, चणे इत्यादिकांचे. गुण–रुचकर, अग्निदीपक, पौष्टिक, स्वरवर्ण बल अग्नि यांना वाढविणारे. योग्य घाम आणणे, संतोष, पुष्टि व सुख यांचीही प्राप्ति यापासून होते. कढणाचे अनेक प्रकार आहेत. मुद्गयूष, विरसिकायूष, दाडिमयूष, चित्रकयूष, आमलकयूष, पंचकोलयूष सालीचायूष, धान्ययूष, कुलत्थयूष, फलयूष, पुष्पपत्रयूष, यूष, पल्लवयूष, महायूष, रास्ना, चांगेरी, मूलक, पुनर्नवा, अतिबला, गुडकांबलिक, त्रिकटु, लशुन चुका या प्रत्येकाचे कढण.

**योग**–पु., **सम्यक्प्रवृत्तिः** ( चसि. ६.३१ ) योग्य प्रवृत्ति.
**संबन्धः** ( चसू. १.५४ ) संबंध.
**योजना युक्तिः** ( चसू. २५.४० ) योजना.
**तन्त्रयुक्ति० योगो नाम योजना, व्यस्तानां पदानामेकीकरणम्** ( चसि. १२.४१ ) **येन वाक्यं युज्यते स योगः** ( सुउ. ६५.९ )
योजना; वाक्यातील निरनिराळ्या पदांचे एकीकरण. दूर असलेल्या शब्दांची जुळणी करून वाक्य तयार करणे.
**प्रयोगः** ( चसू. १.८७ ) प्रयोग.
**विषयव्यावृत्तस्य मनस आत्मन्येव समाधानमवस्थितिर्वा** ( चशा. ५.१७ )
विषयापासून परावृत्त मनाला आत्म्याच्या ठिकाणी स्थिर करणे. समाधी.
**औषधसमूहः** ( सुचि. ६.१३ ) औषधे.
**संयोगः** ( अहसू. ६.३२ ) संयोग.

**–क्षेम**–पु., **अलब्धलाभलब्धपरिपालनपूर्वकं जीवितनिर्वाहः** ( चवि. ३.३६ )
योगक्षेम– जे मिळवावयास पाहिजे ते मिळवून, मिळालेले टिकवून त्यावर जीवितनिर्वाह करणारा.

**–ज**–पु., **वनस्पति० अगरु** ( ध. ३.२५ )
अगरु.

**–धर**–वि., **बुद्ध्यादीनां योगं मेलकं धारयति, यद्वा बुद्ध्यादियोगस्य धारक इति** ( चशा. १.३५ )
बुद्धि इत्यादींचा मिलाफ– समुदाय धारण करणारा ( पुरुष. )

**–बस्ति**–पु., **बस्ति० त्रयो निरूहास्त्रीणि चानुवासनानि तथा चाद्यन्तयोर्द्वौ स्नेहबस्ती इत्येवम् अष्टौ बस्तयो योग इत्युच्यते** ( चसि. १.४९ )
सुरुवातीला एक स्नेहबस्ति, मध्ये तीन तीन निरूह व अनुवासन ( स्नेह ) बस्ति व शेवटी परत एक स्नेह– बस्ति अशा विधीने दिलेल्या आठ बस्तींना योग्य बस्ती म्हणतात.

**–मूषा**–स्त्री., **भस्मीकृतकोकिलतुषसंयुक्ता कृष्णामृत्तिका वल्मीकमृत्तिका विविधं बिडं चेत्येतेषां संयोगाज्जाता विविधबिडेन च लिप्ता मूषा** ( र. १०.११-१२ )
कोळशाची राख, धान्याचा कोंडा, काळी माती, वारुळाची माती, निरनिराळे उपयुक्त औषधी बीड, यांपासून तयार केलेली व त्याला विविध तऱ्हेच्या

औषधि बिडांचा लेप दिलेल्या मूषेला योगमूषा म्हणतात.

**–रङ्ग**–पु., वनस्पति० **नारङ्गः** ( रा. ११.२४ ) मुसुंबे.

**–राज**–पु., कल्प० **पाण्डुरोगे उपयुक्तः, त्रिफलायास्त्रयो भागास्त्रिकटुकस्य च त्रयो भागा विडङ्गचित्रकमूलस्य भागैकः शिलाजतुरूप्यमलानां पञ्चभागाः माक्षिकलौहस्य च पञ्चभागाः, अष्टौ भागाः सितायाश्चैत्येतत् सर्वं माक्षिकेणाऽऽलुल्याऽऽयसे भाजने स्थापयित्वोदुम्बरसमां मात्रां सेवेत, तत्र काकमाचीकुलत्थकपोतकानि वर्ज्यानि, इदं सर्वरोगहरं श्रेष्ठं रसायनम् । तथाऽयं कल्पविशेषः पाण्डुरोगविषकासयक्ष्मविषमज्वरकुष्ठाजीर्णमेहशोषश्वासारोचकापस्मारकामलार्शोनाशनश्च** ( चचि. १६.८०-८६ ) योगराज. एका सिद्धौषधाचे नाव. पांडुरोगात उपयुक्त. त्रिफला ३ त्रिकटु ३ वावडिंग १ चित्रकमूळ १ शिलाजतु, रुपे, मंडूर ५।५, माक्षिक, लोह ५।५ भाग, खडीसाखर ८ भाग, मधात कालवून लोखंडी भांड्यात ठेवावे. उंबराएवढी गोळी घ्यावी. कावळी, कुळीथ, कवडा पक्ष्याचे मांस, वर्ज्य. गुण–सर्वरोगहर श्रेष्ठ, धातुवर्धक. पांडुरोग, विष, खोकला, क्षय, विषमज्वर, कुष्ठ, अजीर्ण, प्रमेह, शोष, श्वास, अरुचि, अपस्मार, कावीळ, मूळव्याध नाशक.

**–राजगुग्गुलु**–पु., भैषज्य० **पिप्पलीपिप्पलीमूलचव्यचित्रकशुण्ठीपाठाविडङ्गेन्द्रयवहिङ्गुभारङ्गीवचासर्षपातिविषाजीरकरेणुककृष्णजीरकगजपिप्पलीकटुकाजमोदामूर्वाभ्यः समभागिकाभ्यः चूर्णिताभ्यो द्विगुणां त्रिफलामादाय तत्र च शुद्धगुग्गुलुं प्रक्षिप्य यथावन्मर्दयित्वा तद्वटिकाः कुर्यात् । अनुपानं–मधु; समयः–प्रातः; फलम्–अर्शोवातगुल्मपाण्डुरोचकनाभिशूलोदावर्तप्रमेहवातरक्तकुष्ठक्षयाऽपस्मारहृद्रोगग्रहणीश्वासकासभगन्दराग्निमान्द्यवीर्ययोनिदोषाणां शमनम्, निष्परीहारं पानभोजनयोः तत्कृतान् सतताभ्यासाद्वलीपलितं नश्यति वर्षशतत्रयं आयुर्जायते क्षीरघृतपरिप्लुताहारश्चास्य विशेषेण भक्षणीयः** ( र. २१.७४-८३ )

योगराजगुग्गुळ. एका सिद्धौषधाचे नाव. पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ, पहाडमूळ, वांवडिंग, इंद्रजव, हिंग, भारंग मूळ, वेखंड, मोहरी, अतिविष, जिरे, रेणुक बी, काळे जिरे, गजपिंपळी कुटकी, अजमोदा, मोरवेल ही समभाग घेऊन दुप्पट त्रिफळा घालून शुद्ध गुग्गूळ टाकून वड्या कराव्या. अनुपान–मध. वेळ–सकाळी. फल–मूळव्याध, वातगुल्म, इत्यादी वर दिलेले रोग नाशक. अपथ्य काही नाही. सतत सेवनाने त्वचेवरील वळ्या, पांढरे केस नाहीसे होतात. तीनशे वर्ष आयुष्य होते. तूप, दूध युक्त आहार विशेषतः घ्यावा.

**–वाह**– वि., **एतादृशः वायुः, येन स योगाद्योगिनो गुणं वहतीति; तेजसा युक्तो दाहकृत्, सोमयुक्तः चेत् शीतकर इति** ( चचि. ३.३८-३९ )

योगवाही असा वायु. म्हणजे तो ज्याच्याशी योग करतो त्याचे गुण धारण करतो, तेजासह तेजाचा दाहकर गुण व सोमासह सोमाचा थंड करण्याचा गुण धारण करतो.

**–वाहिन्**–वि., **यत् संयुक्तस्य द्रव्यस्य रसं वहति, तत्** ( चसू. २७.२४९ ) **यादृग्द्रव्येण संयुज्यते तादृग्द्रव्यस्य कर्म करोतीति, योगवाहिषु श्रेष्ठं मधु** ( सुसू. ४५.१४२ )

योगवाही. ज्या द्रव्याशी मिश्र केले असेल त्याच्या रसाचे गुण वाढवणारे द्रव्य योगवाही होय. योगवाही द्रव्यात मध हे श्रेष्ठ आहे.

**योगर**–पु., खनिज० **सूक्ष्मताराणि** ( र. ५.८२ )

कुरळ्या केसासारख्या सूक्ष्म रेषा.

**योगाञ्जन**–न., अञ्जन० **कासीससामुद्ररसाञ्जनजातिकोरकादिभिः कृतम्** ( सुउ. ११.१५-१६ )

योगाञ्जन नावाचे अंजन. हिराकस, मीठ, रसांजन, जाईच्या कळ्या इत्यादिकांनी केलेले अंजन.

**योगावह**–वि., **योग्यम्** ( चनि. २.१४ )

योग म्हणजे प्रयोग लागू होतो योग्य ठरतो तो. योग्य.

**योगिन्**–पु., वनस्पति० **नारङ्गः** ( ध.५.२० ) मोसंबे.

**रसरत्नमुच्चयकर्त्रा सिंहगुप्तसूनुना प्रमाणत्वेन स्वीकृतः तन्त्रकर्ता** ( र. १.५-९ )

रसरत्नमुच्चयकर्त्या सिंहगुप्तपुत्राने प्रमाण मानलेला तंत्रकर्ता.

**योगः समाधिः स यस्य विद्यते सः** ( सुसू. ३.१७)

समाधि ज्याला साधते तो.

**–दण्ड**–पु., वनस्पति० **वेत्रः** ( रा.परि. ७.१४ )

वेत.

**योगीश्वरी**–स्त्री., वनस्पति० **वन्ध्यकर्कोटकी** ( ध. १.१८६ )

वांझकर्टोली.

**योगीष्ट**–न., खनिज० सीसकम् ( ध. ६.२१ ) सिसे.

**योग्या**–स्त्री., वनस्पति० ऋद्धिः ( ध. १,१४५ )
ऋद्धि. अष्टवर्गांपैकी.
**सम्यक्कर्माभ्यासः** ( सुसू. ९.१ )
कर्माचा योग्य अभ्यास.

**–सूत्रीय**–वि., योग्यासूत्रमधिकृत्य कृतोऽध्याय-संज्ञाविशेषः ( सुसू. ९.१ )
अध्यायाचे नाव. यात शस्त्रक्रियेचा अभ्यास कसा करावा हे आहे.

**योग्यार्ह**–वि., यस्य कर्मणो यस्मिन् द्रव्ये साम्यं भवति तत्कर्माभ्यासयोग्यम् ( सुसू. ९.५ )
शस्त्रकर्माच्या प्रथम कर्माभ्यासाला योग्य. अशी फळे, फुले इत्यादी.

**योजन**–न., चत्वारः क्रोशाः ( सुचि. ३०.३५ )
चार कोस.

**( योजना )**–स्त्री., प्रयोगः योजनम् ( अहसू. ४.७ )
प्रयोग, योजना.

**–वल्ली**–स्त्री., वनस्पति० मंजिष्ठा (ध. १.१७) मंजिष्ठ.

**–सिद्धि**–स्त्री., योजनायां सत्यां सिद्धिः ( चइ. १२.८२ )
योजना केली असता सिद्धि.

**योज्य**–न., खनिज० पुष्पकासीसम् ( ध. ३.१२५ )
हिराकस.

**योनला**–स्त्री., वनस्पति० जूर्णा ( ध.६.१०८ ) जोंधळा.

**योनि**–स्त्री., कारणम् ( चचि. २४.६ ) हेतुः (सुसू. १५.८) **उत्पत्तिस्थानम्** ( सुनि. १०.२१-२२ ) **आधार-कारणम्** ( चसू. २६.९ ) **अभिव्यक्तिकारणम्** ( चसू. १२.८ ) **तत्तज्जन्मग्रहणोचिता जातिः** ( चशा. १.६ ) **जन्म, चेतनशरीराणां जातिभेदः** ( चसू. ११.११ )
कारण, हेतु, उत्पत्तिस्थान, आधारकारण, अभिव्यक्तीचे कारण; तो तो जन्म घेण्यास योग्य अशी जात. जन्म. चेतनावान शरिराचा जातिभेद.
**शारीर० शंखनाभ्याकृतिरावर्तत्रययुक्ता** (सुशा. ५.४३) **अपत्यपथः**(चचि. ३०.१५) **गर्भाशयः**(सुसू. ११.२८) **योनिमुखम्** ( सुशा. ५.४५ ) **अपत्यपथे चतस्रः पेश्यस्तासां प्रसृतेऽभ्यन्तरतो द्वे मुखाश्रिते बाह्ये च वृत्ते द्वे गर्भच्छिद्रसंश्रितास्तिस्रः शुक्रार्तवप्रवेशिन्यस्तिस्रः एव पित्तकफाशययोर्मध्ये गर्भशय्या यत्र गर्भस्तिष्ठति** (सुशा. ५.३९) **'पुंसां पेश्यः पुरस्ताद्याः प्रोक्ता लक्षणमुष्कजाः । स्त्रीणामावृत्य तिष्ठन्ति फलमन्तर्गतं हि ताः ॥'** ( सुशा. ५.४१)
योनि, अपत्यमार्ग, गर्भाशय. शंखातील गाठीच्या आकारासारखी तीन वलयांनी ( भोवऱ्यांनी ) युक्त. योनीचे मुख. अपत्याच्या मार्गात चार पेशी. त्यात दोन बाह्य वाटोळ्या मुखाश्रित व दोन आत. गर्भाशयाच्या छिद्राशी तीन. शुक्रार्तव प्रवेश होणाऱ्या तीन.
कफाशय, पित्ताशय यांच्या मध्ये गर्भाशय–गर्भशय्या आहे. येथे गर्भ रहातो. पुरुषाच्या वृषण म्हणून ओळखल्या जाणाऱ्या ज्या पेशी, त्याच स्त्रीमध्ये कटिरात फल या नावाने आत आवरणात आहेत.

**–कन्द**–पु., रोग० यो यौनौ पूयशोणितसंकाशं निकुचाकृति. संनिभं कन्दं जनयति. स एव योनि-कन्दः ( मा. )
योनिकंद नांवाचा योनिरोग योनीत पू व रक्त यांसारख्या रंगाचा गोलाकार कंद होतो तो.

**–गद**–पु., स्त्रीष्वपत्यमार्गे जातो रोगः ( चचि. ३०.३७ )
स्त्रियांना अपत्यमार्गात झालेला रोग.

**–गुल्म**–पु., रोग० योनिस्थो गुल्मः ( काखिल. १०.१४६ )
योनिमध्ये होणारा गुल्मविकार.

**–च्छेद**–पु., लक्षण० योनिविदारणम् तस्य च्छेदाद्रुजा प्रादुर्भवति ( सुचि. ७.३६ )
योनि फाटणे, विदारण होणे. त्यामुळे वेदना होतात.

**–दोष**–पु., रोग० योनिरोगः ( चचि. ३०.९५ )
योनिरोग.

**–पुट**–न., अपत्यपथः ( असंउ. १ )
अपत्यपथ, अपत्यमार्ग.

**–प्रदोष**–पु., रोग० योनिरोगः ( चसू. १३.९५ )
योनिरोग.

**–प्रस्रवण**–न., लक्षण० योनिस्रावः ( काजातिसूत्रीय )
योनीतून येणारा स्राव.

**–भ्रंश**–पु., योनिरोगः योनिबहिर्गमनम् ( सुनि. ८.६ )
गर्भाशय स्वस्थान सोडणे; गर्भाशयातून योनि बाहेर येणे.

**–रोग**–पु., रोग० योनिसहितगर्भाशयस्य विंशति-संख्याकेष्वन्यतमो रोगः ( र. २.१७५ )
योनि व गर्भाशय यांच्या वीस रोगांपैकी रोग.

**–वात**–पु., योनिरोगःयोनिस्थवातदोषः(चचि.३०.५४) योनीमधील वातदोष.

**–विरेचन**–न., उत्तरबस्तिः ( चचि. ५.१७४ ) उत्तरबस्ति. योनीत बस्ति देणे.

**–विशोधन**–वि., योनेर्विशेषेण शोधनं नामशुद्धिकरणम् ( चसू. १३.१५ ) योनि शुद्ध करणे.

**–व्यापद्**–स्त्री., योनिरोगः ( चचि. ३०.७ ) तत्र चरके विंशतिर्योनिव्यापदः ताश्च–वातजा पित्तजा कफजा त्रिदोषजाऽसृग्जाऽरजस्काऽचरणाऽतिचरणा प्राक्चरणोपप्लुतोदावर्तिनी कर्णिनी पुत्रघ्न्यन्तर्मुखी सूचीमुखी शुष्का वामिनी षण्डी महायोनिश्च ( चचि. ३० ) सुश्रुतेऽपि विंशतिः, उदावर्ता वन्ध्या विप्लुता परिप्लुता वातला रुधिरक्षरा वामिनी स्रंसिनी पुत्रघ्नी पित्तलाऽत्यानन्दा कर्णिन्यचरणाऽतिचरणा श्लैष्मिका षण्डी फलिनी महती सूचिवक्त्रा सर्वजा च ( सुउ. ३८.६-९ ) संग्रहे लोहितक्षयाऽधिका ( असंउ. ३८ ) तत्र वातजायां योनौ तोदशूलस्तम्भकार्कश्यानि पिपीलिकाविसर्पणमिव वेदना, सशब्दरुक् फेनतनुरूक्षार्तवम् ( चचि. ३०.९-११ ) पित्तजायां योनौ दाहपाकज्वरोष्णनीलपीतार्तवाभृशोष्णकुणपस्रावाः ( चचि. ३०.१२ ) कफजा योनिः पिच्छिला शीता कण्डूग्रस्ताऽल्पवेदना पाण्डुवर्णा पाण्डुपिच्छिलार्तववाहिनी च ( चचि. ३०.१३,१४ )

योनिरोग वीस प्रकारचे आहेत. नावे वर आहेत. चरक सुश्रुतात वीस व संग्रहांत लोहितक्षया अधिक. वाताने टोचणी, शूल, कर्कशता, ताठरपणा, मुंग्या येतात अशा वेदना, रजःस्राव फेसाळ रूक्ष पातळ शब्द व वेदनायुक्त होतो. पित्ताने दाह, पिकणे, ज्वर, अति उष्ण, निळसर पिवळे रज व प्राणी सडल्यारखी घाण असलेला अति उष्ण स्राव. कफाने बुळबुळीत, थंड, खाज वेदनायुक्त पांढरे रज स्रवणारी.

**–व्यापच्चिकित्सित**–न., अध्यायसंज्ञा० (चचि. ३०.१) या नावाचा अध्याय. यांत योनिरोगाचे उपचार आहेत.

**–व्यापत्प्रतिषेध**–पु., अध्याय० ( सुउ. ३८.१ ) या नावाचा अध्याय. यात योनिरोगाचे उपचार आहेत.

**–व्रण**–पु., लक्षण० योनौ त्वग्विदरणम् (असंसू. ३४) योनीची त्वचा फाटणे.

**–व्रणेक्षणयन्त्र**–न., यन्त्र० इदं मध्यभागे सुषिरं दैर्घ्येण षोडशाङ्गुलं तथा मुद्रिकया ऊर्मिकयाऽसंचारिण्या युक्तं, तत्र चत्वारि पत्राणि, चतस्रः शलाका वर्तन्ते, तस्य मुखं मुकुलसदृशम्; इदम् मूले आक्रान्तं मूलशलाकाक्रमणान्मुखे प्रसरेत् ( अहसू. २५.२२ )

योनीतील सर्व भाग पहाण्याच्या उपयोगी पडणारे यंत्र. हे मध्यभागी पोकळ, सोळा अंगुळे लांब, आंगठी सारखे गोल कडे पक्के बसवलेले, चार पानांचे चार सळ्यांचे फुलाच्या कळीसारख्या मुखाचे असते. मुळाशी असलेल्या सळईच्या हालचालीने त्याचे तोंड पसरट होते.

**–शूल**–पु., लक्षण० योनिवेदना (सुनि.८.३) योनिशूल.

**–शोष**–पु., योनेः शुष्कता ( चसि. २.१६ ) योनि शुष्क असणे.

**–संवरण**–न., योनिरोगः, योनीसंकोचः (सुनि. ८.६) एक योनिरोग. योनीचा संकोच.

**–संवृति**–स्त्री., लक्षण० योनिसंकोचः (सुसू. ३३.१३) योनि संकोच.

**–स्तम्भ**–पु., लक्षण० योनेः स्तम्भः ( चसि. २.१६ ) योनीचा भाग ताठणे.

**–स्रवण**–न., लक्षण० योनिस्रावः ( असंशा. ४.११ ) योनीतून स्राव येणे.

**योषा**–स्त्री., नारी ( र. ११.१०५ ) स्त्री.

**योषित्**–स्त्री., वनिता ( सुउ. १०.५ ) स्त्री.

**–क्षीर**–न., स्त्रीस्तन्यम् ( सुउ. १०.५ ) स्त्रीदुग्ध.

**–प्रसङ्ग**–पु., योषिता सह प्रसंगः, व्यवायः ( सुचि. २६.४ ) मैथुन; संभोग.

**( योषिद् ) विविक्तरति**–वि., योषित्सु विविक्ते एकान्ते च रतिर्यस्य सः ( सुउ. ६२.१० ) एकांतामध्ये स्त्रीशी मैथुन करण्याची आवड असणारा.

**यौगिक**–वि., युक्तिं प्रमाणीकृत्य कृतम्, औषधकल्पनादिषूपयुक्तम् ( चवि. ८.१४९ ) योग्य तऱ्हेने प्रमाणाने तयार केलेले; औषध योजनेत वापरलेले.

युक्तम् ( अवि. ८.४५ ) योग्य, योजलेले.

पारदे नागस्य वङ्गस्य वा संयोगाज्जायमानो (दोषः) ( र. ११.१७-१८ )

पाऱ्यामधील नाग वंगनिर्मित दोष.

**यौवन**–न., आत्रिंशद्वर्षं वयोवस्थाविशेषः (सुसू. ३५.२९) वयाच्या तिसाव्या वर्षापर्यंत.

**–पिडका**–स्त्री., क्षुद्ररोग० मुखदूषिका पिडका (सुनि. १३.३) क्षुद्ररोग.

## र

**रकसा**–स्त्री., रोग० क्षुद्ररोगः, शरीरे कण्डून्विता संस्रावहीना या पिडका, सैव रकसा (सुनि. ५.१५) क्षुद्र रोगाचे नाव. सुकी खरूज.

**रक्त**–वि., रक्तवर्णयुक्तम् (सुसू. ३८.५२) लालवर्णयुक्त. पु., वर्ण० ताम्रवर्णः (सुसू. ३२.३) लाल रंग. न., रजः (चचि. १५.१७) आर्तवम् (सुसू. १४.६) न., सप्तधातुष्वेकः (अहसू. १.१३) दशप्राणायतनेष्वेकम् (चसू. २९.३) आगमे रक्तनामानि शोणितलोहितासृग्रुधिरक्षतजादीनि; स्थानमस्य यकृत्प्लीहानौ, तत्रस्थमेव शेषाणां शोणितस्थानानामनुग्रहं करोति (सुसू. २१.१६) रक्तोत्पत्तिः–द्वितीया रक्तधरा कलामांसस्याभ्यन्तर-तस्तस्यां शोणितं विशेषतश्च सिरासु यकृत्प्लीह्नोश्च भवति (सुशा. ४.१०) तत्राग्निरेव रसं रक्ततां नयति (चचि. १५.२८) 'स्वस्थानस्थस्य कायाग्नेरंशा धातुषु संश्रिताः तेषां सादातिदीप्तिभ्यां धातुवृद्धिक्षयोद्भवः ॥' (अहसू. ११.१४; चचि.१५.३८-३९) उत्पत्तिकालः रसः किलैकाहे-नैव संपद्यते तदनन्तरं ये–षड् धातवस्ते प्रत्येकं पञ्चभिरहोभिः संपद्यन्ते (सुसू. १४.१५; ड) स्वभावः–तत्राम्बुशारीरमहासारभूतं रसाख्यमवि-कृतमविकृतेन तेजसा रञ्जितमिन्द्रगोपाकारं च शशशोणितगुञ्जाफलालक्तकपद्मसुवर्णवर्णं धौतं च विरज्यमानं मधुरमीषल्लवणं च स्निग्धमशीतोष्णं गुरु पित्तैकचयकोपोपशमनं सौम्याग्नेयं प्रकृत्या रक्तमाहुस्तदा दूष्यम्। दोषमिति केचित्। उभयात्मकमित्यन्ये (असंसू. ३६.६) द्रवरूपो धातुः (चचि. १५.३६) पाञ्चभौतिकगुणाः–विस्रता द्रवता रागः स्पन्दनं लघुता च (सुसू. १४.९) अनुष्णशीतं मधुरं स्निग्धं वर्णतो रक्तं गुरु विस्रं च (सुसू. २१.१७) रक्तसारतायां स्निग्धताम्रनखनयनतालुजिह्वौष्ठपाणिपादतलम् (सुसू. ३५.१६)

कर्ण...ललाटमेहनं स्निग्धरक्तवर्णं श्रीमद्भ्राजिष्णु रक्तसाराणाम्। सा सारता सुखमुद्धतां मेधां मन-स्वित्वं सौकुमार्यं अनतिबलमक्लेशसहिष्णुत्वमुष्णा-सहिष्णुत्वमाचष्टे (चवि. ८.१०४) प्रमाणम्–अष्टावञ्जलयः (चशा. ७.१५) कर्मवर्णप्रसादो मांसपुष्टिर्जीवनं धातूनां पूरणं, असंशयं स्पर्शज्ञानं च (सुशा. ७.१४; सुसू. १५.५(१)) यकृत्प्लीहानौ शोणितजौ, शोणितफेनप्रभवः फुफ्फुसः शोणितकिट्टप्रभव उण्डुकः (सुशा. ४.२५) अवयवजनकत्वंयकृत्प्लीहानौशोणितजौरक्तफेनप्रभवः फुफ्फुसः रक्तकिट्टप्रभावात् उण्डुकः तथैव च आंत्रं, गुदं, बस्ति, जिव्हा, वृक्कौ, वृषणौ हृदयं चापि रक्तात् तथैवान्येषां धातुघटकानां सारान् भवति (सुसू. ४२६.३१)

उपधातवः–असृजः कण्डराः सिराः (चचि.१५.१७) मलः–पित्तम् (चचि. १५.१८; सुसू. ४६.५२९) प्रशस्तिः–रुधिरं देहस्य मूलं तेनैव स धार्यते, तस्माद्यत्नेन तत्संरक्ष्यम् (सुसू. १४.४४) केचिद्रक्तं चतुर्थं दोषं मन्यन्ते (अरु. अहसू. १.६,) रक्त-वृद्धिलक्षणानि– विसर्पप्लीहावृद्धिविद्रधिकुष्ठवातरक्त-गुल्मोपकुशकामलाव्यङ्गाग्निनाशसंमोहरक्तत्वङ्नेत्र-मूत्रताः (अहसू. ११.८-९) रक्तक्षयलक्षणानि–अम्लशिशिरप्रीतिः सिराशैथिल्यं रूक्षता च (अहसू. ११.१७) रक्तप्रकोपहेतुः–पित्तप्रकोपणैरेव चाभीक्ष्णं द्रवस्निग्धगुरुभिराहारैर्दिवास्वप्नक्रोधा-नलातपश्रमाभिघाताजीर्णविरुद्धाध्यशनादिभिश्च (सुसू. २१.२५) रक्तरोगाः–कुष्ठविसर्पपिडकामशक-नीलिकातिलकालकन्यच्छव्यङ्गेन्द्रलुप्तप्लीहविद्रधि-गुल्मवातशोणितार्शोऽर्बुदाङ्गमर्दासृग्दररक्तपित्तप्रभृ-तयो रक्तदोषजाः (सुसू. २४.९) दुष्टरक्तलक्षणम्–वातादरुणाभं विशदं फेनिलं तनु च, पित्तात् पीता-सितं रक्तं औष्ण्यवशात् चिरेण स्त्यानं, कफादीष-त्पाण्डुपिच्छिलं तन्तुमद् घनम्, संसर्गात् त्रिलिङ्गं सांनिपातिकम् (चसू. २४.२०-२१) मृगादि-प्राणिनां रक्तं भेषजत्वेनोपयुज्यते (अहसू. २७.४३; असंउ. ३९)

रक्त म्हणजे तांबडा वर्ण, स्त्रियांचे आर्तव, रज. रक्त– सात धातूंपैकी एक. दहा प्राणायतनांपैकी एक. रक्ताला– शोणित, लोहित असृग्, रुधिर, क्षतज अशा नावांनीहि ओळखतात.

**रक्तउत्पत्तिकाल**—एक दिवसात अन्नाचा रस धातु बहुधा बनतो. नंतर प्रत्येक धातु पाच पाच

दिवसांनी निर्माण होतात. या सिद्धान्ताने ६ दिवसात रक्त उत्पन्न होते.
यकृत प्लीहा यातील रक्त, शेष रक्तस्थानांना बल देते. रक्तधरा कला मांसाच्या आत असते. विशेषतः यकृतप्लीहेमध्ये व रोहिणी शिरात असते. तेथील रंजकाग्नीच रसाला रक्त बनवतो. कायाग्नीचे अंश धातूत असतात, त्यांच्या मंदत्वाने त्या धातूची वृद्धि व तीव्रतेने क्षय होतो. शरिरातील आहारजन्य सारभूत द्रवरूप जलीय अविकृत घटक रस नावाचा, अविकृत. अग्नीने लाल इंद्रगोप, सशाचे रक्त, गुंजेचे बी, अळता, लाल कमळ, सुवर्ण यांच्या रंगासारखे लाल, गोड, थोडे खारट, स्निग्ध, अशीतोष्ण, आग्नेय व सौम्य, जड, पित्ताचा संचय, प्रकोप व शमन करणाऱ्या कारणाने संचयादि होणारे व वस्त्रावर पडलेला डाग धुतल्यावर स्वच्छ निघून जातो ते रक्त होय. ते दूष्य आहे, कित्येक त्याला दोषही म्हणतात. काही दोष दूष्य असे दोन्ही म्हणतात. **स्वभाव**—हा द्रवरूप धातु. थोडी दुर्गंधी, द्रवत्व, रंग, स्पंदन, हलकेपणा हे क्रमशः पांचभौतिक गुण यात आहेत. **रक्तसारत्व**--असले तर ती व्यक्ति नखे, डोळे, टाळु, जीभ, ओठ, तळहात, तळपाय, कपाळ, शिश्न, स्निग्ध व तांबडी असलेली सुशोभित व तेजस्वी असते. ती सुखी, तीव्र बुद्धिमान, मनाप्रमाणे वागणारी, सुकुमार, बल फार नसलेली, फार क्लेश सहन न करणारी व उष्णता सहन न करणारी असते. **प्रमाण**- आठ ओंजळी. **कर्म**- वर्ण प्रसन्न ठेवणे, मांसपुष्टि, जीवनशक्ति, धातूचे पूरण व निस्संशय स्पर्शज्ञान. **अवयव जनकत्व**- यकृत, प्लीहा, रक्तज, फुफ्फुस, रक्ताच्या फेसापासून व उण्डुक, रक्त व किट्ट यांपासून होते. आंत्र गुद, बस्ति, जीभ, वृक्क, वृषण, हृदय हे अवयवही **रक्त** व इतर धातुघटक यांच्या सारापासून होतात. **उपधातु**- कण्डरा व शिरा रक्ताचे उपधातु होत. **मल**- रक्ताचा मल. पित्त, **प्रशस्ति** शरिराचे रक्त हे मूल आहे. त्यानेच त्याचे धारण होते म्हणून त्याचे रक्षण यत्नाने करावे. **दोष**- रक्त हा चौथा दोष सुश्रुतांनी मानला आहे. **रक्त-वृद्धीची लक्षणे**— धावरे, प्लीहावृद्धि, कुष्ठ, वातरक्त, गुल्म, उपकुश, कावीळ, वांग, अग्निमांद्य, मूर्च्छा, त्वचा, डोळे, लघ्वी, लाल होणे. **रक्त-क्षय लक्षणे**— आंबट व थंड आवडणे, शिरा शिथिल होणे व रूक्षता. **रक्तप्रकोपाची कारणे**- पित्तप्रकोपक कारणे—द्रव, स्निग्ध, जड, आहार; दिवसा झोपणे; क्रोध, अग्नि, ऊन्ह, भ्रम, आघात, अजीर्ण, विरुद्ध व जेवणावर पुन्हा जेवणे इ० **रक्तव्यापत्ति**- रक्तदुष्टीने होणारे रोग. कुष्ठ, धावरे, पुळ्या, मस, निळे डाग, तीळ, वांग, चाई, प्लीहा, गळू, गोळा, ( गुल्म ) वातरक्त, मूळव्याध, आवाळू, अंग दुखणे, रक्तप्रदर, रक्तपित्त, इत्यादी रोग. **दुष्टरक्तलक्षणे—वाताने**-काळसर, लाल, पातळ, फेसाळ व बुळबुळीतपणा नसलेले. **पित्ताने**- पिवळे, काळे, अधिक वेळाने घट्ट होणारे. **कफाने** थोडे पांढरके, बुळबुळीत, तन्तुयुक्त दाट. संसर्ग-जोडदोष या चिन्हांपैकी दोन दोषांच्या चिन्हांनी युक्त. सन्निपात—**त्रिदोषदुष्ट**- तिन्ही दोषांच्या चिन्हांनीं युक्त. **औषधि रक्त**—हरिण शेळी इत्यादि प्राण्याचे रक्त औषध म्हणून उपयुक्त होते.

न., **खनिज० हिङ्गुलम्** ( रा. १३.४७ ) हिंगूळ.
**सिन्दूरम्** (रा. १२.१६०) शेंदूर.
**वनस्पति० मञ्जिष्ठा** ( र.२९.१३२ ) मंजिष्ठ.
**रक्तशिग्रुः** (र. २९.१३२) लाल शेवगा.
**रक्तचन्दन** (र. २९.१३२) लाल चंदन, रक्तचंदन.
**पद्मकः** ( रा.२२.१४९ ) पद्मकाष्ठ.
**कुङ्कुमम्** ( ध.३.१२ ) केशर.
**अपामार्गः** ( ध.१.२६३ ) आघाडा.
**व्रीहिः** ( रा. १६.७९ ) तांदुळाचा एक प्रकार.
**हिज्जलः** ( रापरि. ८.७० ) लाल जलवेतस.
**भैषज्य० प्रवालम्** ( ध. ६.६४ ) प्रवाळ.

**(रक्ता)**-स्त्री., **वनस्पति० मञ्जिष्ठा** ( सुचि.३७.३१ ) मंजिष्ठ.
**मांसरोहिणी** ( ध. ४.९४ ) कुटकी.
**गुञ्जा** ( रा. ३.४७ ) लाल गुंजा.
**उष्ट्रकाण्डी** ( रापरि. १०.४३ )
तांबड्या फुलांची कांडे असलेली वनस्पती.
**भैषज्य० लाक्षा** ( ध. ३.८२ ) लाख.
**लूताभेदः, वायव्यलूता; दंशलक्षणानि—पाण्डु-पिडकाज्वरश्वेतातिसारश्वासदाहसरक्तक्लेदाः**
( असंउ. ४५ )
वातप्रकृतिलूता. पांडुरोग, पुळ्या, ताप, पांढरा अतिसार, श्वास, दाह, तांबडे स्राव.

शारीर० कर्णगतसिरा ( असंउ. १ )
कानाकडे गेलेली शीर.

**–कन्द्**– वनस्पति० पलाण्डुभेदः राजपलाण्डुः ( रा. ७.१०४ ) द्र० 'पलाण्डु'
लाल कांदा.
**रक्तपिण्डालुः** ( रापरि. ७.२६ )
लाल रताळे.

**–कर्मन्**–न., सुवर्णोत्पादकं पारदादिरञ्जकं कर्म ( र. २.१० )
किमयेत सोने करण्यासाठी. पारदादिकाना लाल रंग आणणे.

**–काण्डा**–स्त्री., वनस्पति० पुनर्नवा ( रा. ५.४०६ )
पुनर्नवा.

**–काष्ठ**–न., वनस्पति० चन्दनभेदः, कुचन्दनम् ( ध. ३.६ ) द्र० 'चंदन'
लाल चंदन, रक्त चंदन.

**–कुसुम**–पु., वनस्पति० पारिभद्रः ( रापरि. ८.१० )
पारिजातक.
**धन्वनः** ( रापरि. ९.१९ ) धावडा.

**–केसर**–पु., वनस्पति० पारिभद्रः ( रापरि. ८.१० )
पारिजातक.

**–कोठ**–पु. चत्वारिंशत्पित्तविकारेष्वेकः, त्वचि दद्रुवद्रक्तमण्डलोत्पत्तिः ( चसू. २०.१४ )
त्वचेवर गजकर्णासारखी लाल चकंदळे येणे. पित्ताच्या ४० विकारांपैकी एक रोग.

**–क्षय**–पु., रक्तस्य प्रमाणहानिः ( सुनि. ११.१७ )
रक्ताचा क्षय.

**–क्षीण**–वि., क्षीणरक्तः ( ड. सुसू. १५.२९-३१ )
रक्तक्षीण.

**–ख्यातक**–पु., वनस्पति० अपामार्गः ( ध.१.२६३ )
आघाडा.

**–गन्ध**–पु., रक्तधातुनिष्ठो विस्रो गन्धः, तेन मूर्च्छा संजायते ( सुउ. ४६.९-१० )
रक्त धातूला असलेला दुर्गंध. या वासाने कित्येकांना मूर्च्छा येते.

**–गन्धक**–पु., निर्यास० बोलम् ( रा. ६.११६ )
बोळ.

**–गुल्म**–पु., रोग० असौ स्त्रिया एव भवति। या ऋतुमती नवप्रसूता योनिरोगिणी वा वातलानि यदाऽऽसेवते तदाऽस्या वायुः प्रकुपितः सन् योन्या मुखमनुप्रविश्यार्तवमुपरुणद्धि। तदुपरुध्यमानं मासे मासे कुक्षिमभिनिवर्तयति गर्भलिङ्गानि च तन्द्राऽङ्गसाददौहृदस्तन्यदर्शनादीनि चाभिनिर्वर्तयति। वायुसंसर्गात्पुनः पित्तैकप्रकोपकतया वातपित्तगुल्मरूपाणि क्रमाच्छूलस्तम्भदाहातीसारादीनि गर्भाशये च सुतरां शूलं योन्यां दौर्गन्ध्यमास्रावं च करोति। गुल्मसर्वाङ्गैर्गर्भ इव न स्फुरति पिण्डीभूत एव चिरेण सशूलं स्पन्दते। गुल्म एव वर्धते न कुक्षिः ( असंनि. ११ ) रक्तगुल्मगर्भयोः समानलक्षणेऽपि भेदाः– ( १ ) गर्भोऽङ्गप्रत्यङ्गवान् विचेष्टते रक्तगुल्मस्तु लोष्टवद्विचेष्टते ( २ ) गर्भो व्याविद्धं परिवर्तते, गुल्मोऽव्याविद्धं विवर्तते ( ३ ) गर्भोऽहन्यहनि मासि मासि च तां तामवस्थां प्रतिपद्यते। गुल्मस्तु मन्दं मन्दं विवर्धते। ( ४ ) गर्भिणी अनिमित्तं दह्यते ज्वर्यते वा। गुल्मिनी दह्यते ज्वर्यते च ( काखिल. ९.५६-६१ ) उपद्रवाः– ज्वरारुचिश्वासकासशोषकार्श्यारतिशोफाः ( काखिल. ९.७४ ) चिकित्सा– 'मासे व्यतीते दशमे चिकित्स्यः' (चचि. ५.१९) कालपरिणामतो रक्तगुल्मस्याऽऽदशमान्मासात् परं परिपाको भवति। परिपाकतो नातिदुरुपक्रमोऽयं व्याधिः ( काखिल. ९.५३-५४ ) शस्त्रसाध्योऽयं व्याधिः ( सुउ. ४२.२१ )

रक्तगुल्म. स्त्रियांनाच होणारा रोग. ऋतुमती, नुकतीच प्रसूत झालेली, योनिरोग असलेली स्त्री जेव्हा वातवृद्धिकर आहार विहार करते तेव्हा वायु प्रकुपित होतो, व तो योनिमुखात शिरून आर्तवाचा अवरोध करतो. ते अडलेले आर्तव जमल्यामुळे प्रत्येक महिन्याला गर्भाशयात गर्भ असल्याची लक्षणे, डोळ्यावर झापड, अंग गळणे, डोहाळे होणे, स्तनात दूध उत्पन्न होणे, इ० स्वरुपात दिसू लागतात. वायुसंसर्गाने पित्तही प्रकुपित झाल्यामुळे वातपित्तात्मक गुल्मरोगाची लक्षणे क्रमशः शूल, ताठणे, दाह, अतिसार इ० दिसतात. व गर्भाशयात अतिशूल होऊन योनीमधून दुर्गंधयुक्त स्राव होऊ लागतो. तो आर्तवाचा गोळा गर्भाप्रमाणे हालचाल न करता घट्ट होत होत वाढतो. गर्भाशय वाढत नाही. काही काळाने ह्यात शूल व स्पंदन सुरू होते. व यामुळे गर्भ आहे अशी शंका येते. अशी सारखी लक्षणे असूनही **रक्तगुल्म आणि गर्भ यांतील भेद**-(१) गर्भ हा अंग प्रत्यंगयुक्त हालचाल

करतो, गुल्म अगदी दगडासारखा हालचाल करतो. (२) गर्भ व्याविद्ध म्हणजे गति मिळून फिरतो; गुल्म तसा फिरत नाही. (३) गर्भ प्रत्येक दिवशी व प्रत्येक महिन्याला ती ती अवस्था धारण करतो; गुल्म फक्त हळुहळु क्रमाने वाढतो. (४) गर्भिणीला कारणा-वाचून दाह किंवा ताप येत नाही; गुल्म असता मात्र दाह व ताप असतो. **उपद्रव**— ज्वर, अरुचि, श्वास, कोरडा खोकला, कृशता, निरुत्साह, सूज. **चिकित्सा**— दहाव्या महिन्यानंतर करावी. कारण तोपर्यंत गुल्म परिपक्व होऊन चिकित्सेला सुलभ होतो. हा व्याधी शस्त्रसाध्य आहे.

**–ग्रन्थि**–पु., रोग० **बस्तिगतविकारस्य प्रकारः, अश्मरीसमशूलत्वं लक्षणं भवति** ( चसि. ९.४२ ) बस्तीच्या विकारातील एक प्रकार. यात मूतखड्या-सारख्या वेदना होतात.

**–चन्दन**–न., वनस्पति० **चन्दनस्य प्रकारः, गुणाः– तिक्तं शीतं रक्षोघ्नं पित्तकफघ्नं रक्तोद्रेकचक्षुर्दोष-रक्तदोषकासज्वरभ्रान्तिजन्तुकृमितृष्णाघ्नं च** ( ध. ३.४ ) **नारीपयःपिष्टं रक्तचन्दनं हिक्कां शमयेत् नस्यतो दत्तम्** ( सुउ. ५०,१७-१८ )

हिं.—रक्तचन्दन.

**म.—रक्तचन्दन.**

बं.—रक्तचन्दन.

गु.—रतनीली.

ता.—शेनचन्दनम्.

फा.—सन्दलेसुर्ख.

रक्तचंदन, तांबडे चंदन. गुण–कडु, शीत, जंतुनाशक, पित्तकफ नाशक, रक्तवृद्धि व रक्तदोष, डोळ्याचे दोष, खोकला, ज्वर, भ्रम, जन्तु, कृमि आणि तहान नाशक आहे. स्त्रीचे दुधात उगाळून त्याचे नस्य केले तर उचकी थांबते.

**–चित्र**–पु., वनस्पति० **चित्रकः, कालः** ( रा. ६.१२७ ) चित्रक.

**–चूर्णक**–पु., वनस्पति० **कम्पिल्लकः** ( ध. ३.१३८ ) कपिला.

**–च्छेद**–पु., उपक्रम० **रक्तमोक्षः** ( चसि. २.९ ) रक्तस्राव होणे.

**–जम्बीर**–न., वनस्पति० **पक्वजम्बीरम्** ( र. ११.११४ ) पिकलेले लिंबू.

**–तृणा**–स्त्री., वनस्पति० **गोमूत्रिका** ( रापरि. ८.४८ ) काळ्या जमिनीत होणारे तांबडे गवत.

**–दला**–स्त्री., वनस्पति० **नलिका** ( रा. १२.८८ ) गुलछबू, घेवडा.

**–धरा**–स्त्री., शारीर० **द्वितीया कला, रक्तधारिणी; तस्याः स्थानं मांसस्याभ्यन्तरतस्तस्यां शोणितं विशेषतश्च शिरासु यकृत्प्लीह्नोश्च भवति** ( सुशा. ४.१० ) रक्तधरा कला, दुसरी कला. ही मांसात राहून रक्त उत्पन्न व धारण करते. विशेषतः यकृत, प्लीहा, शिरा व मांसात ती असते.

**–धातु**–पु., भैषज्य० **गैरिकम्** (ध. ३.१६७) गेरू, काव. खनिज० **ताम्रम्** ( ध. ६.९ ) तांबे.

**–धातुक**–न., खनिज० **ताम्रम्** ( ध. ६.९ ) तांबे.

**–नाल**–पु., वनस्पति० **जीवन्तः** ( रापरि. ७.८९ ) तांबड्या नाळाची व पानांची वनस्पती. माळव्यात प्रसिद्ध. पोकळा.

**–पत्र**–पु., वनस्पति० **फोण्डालुः** ( रापरि. ७.३० ) लाल पानांचा अळू.

**–पत्रिका**–पु., वनस्पति० **नाकुली** ( रा. ७.१५२ ) मुंगुसवेल.
**पुनर्नवाभेदः क्रूरः** ( रा. ५.४०६,२४ ) पुनर्नवाप्रकार.

**–पद्म**–न., वनस्पति० **कमलभेदः, गुणाः–तिक्तं मधुरं कटु** ( रा. ) **शीतं वृष्यं सन्तर्पणं कफपित्तघ्नं ( वातघ्नं )** ( रा. ) **सन्तापरक्तविकारघ्नं च** ( ध. ४.१५२ )

हिं.—निलोफर, छोटा कन्वल, कृष्ण कमल.

बं.—सुलुक, रक्तोत्पल.

**म.—लाल कमल.**

गु.—निलोपल.

ता.—वेल्लम्बल, इन्दिरावचम्, अल्लितमरै.

कृष्ण कमळ. गुण–कडु, मधुर, तिखट, शीत, पौष्टिक, तृप्तिकारक, कफपित्तशामक, वातशामक, संताप-रक्तपित्त नाशक.

**–पल्लवक**–पु., वनस्पति० **अशोकः** (रा. १०.२७१) अशोक.

**–पाक**–पु., लक्षण० **पक्वं रक्तम्** (अहसू. २९.८-१०) रक्त पिकणे.

**–पादा**–स्त्री., **सौम्यलूताभेदः तस्या दंशलक्षणानि– दंशः आपाण्डुपिटकः शोफयुक्तश्च भवति रक्त-स्रावश्च** ( असंउ. ४५ ) **इयं श्लेष्मविकारदाऽण्डजा च भवति** ( असंउ. ४४ ) **द्र० ' लूता '**

रक्तपादा नावाची सौम्य लूत. दंशलक्षणे—पांढुरक्या पुळ्या, सूज व रक्तस्राव असतो. ही कफविकार करणारी असून ही अंडज आहे.

**-पादी**–स्त्री., वनस्पति० लज्जालुः ( ध. ४.१०९ ) लाजाळू.

**-पान**–न., रुधिरप्राशनम् (अहृसू. २७.४३) रक्त पिणे.

**-पालेवत**–न., वनस्पति० पारेवतम् ( ध. ५.६६ ) खजूर.

**-पिण्डक**–पु., वनस्पति० रक्तपिण्डालुः ( रापरि. ७.२६ ) रताळे.

**-पिण्डालु**–पु., वनस्पति० गुणाः– मधुराम्लो गुरुर्वृष्यः शीतो बल्यः पित्तघ्नः श्रमदाहघ्नः ( रापरि. ७.२६ )

हिं.—रतालु, पिण्डालु काँदु, शकरकन्दी.

**म.—लाल रताळे, पांढरे रताळे.**

गु.—रतालु, शकरकन्द, श्वेतालु.

बं.—लालपिण्डालु, गोलआलु, चुवडिआलु.

त.—यामस्कोलं.

फा.—जरदाक लाहोरी.

रताळे. **गुण**—मधुर, अम्ल, गुरु, पौष्टिक, शीत, बलकारक, पित्तशामक, श्रमदाह नाशक.

**-पित्त**–न., रोग० **निरुक्तिः–संसर्गाल्लोहितप्रदूषणाल्लोहितगन्धवर्णानुविधानाच्च पित्तं लोहितपित्तमित्याचक्षते** ( चनि. २.५ ) **उत्पत्तिकथा–रक्तपित्तप्रकोपस्तु खलु पुरा दक्षयज्ञोध्वंसे रुद्रकोपामर्षाग्निना प्राणिनां परिगतशरीरप्राणानामभवज्ज्वरमनु** ( चनि. २.१० ) **संप्राप्तिः–स्वहेतुभिः प्रकुपितं पित्तं शरीरमनुसर्पद्यदैव यकृत्प्लीहप्रभवाणां लोहितवहानां च स्रोतसां लोहिताभिष्यन्दगुरूणि मुखान्यासाद्य प्रतिरुन्ध्यात् तदैव लोहितं दूषयति** ( चनि. २.४ ) **तत्रिविधमूर्ध्वगमधोगमुभयमार्गजं च** ( चनि. २.८ ) **पूर्वरूपाणि–अनन्नाभिलाषो, भुक्तस्य विदाहः, शुक्ताम्लगन्धरसोद्गारश्छर्देरभीक्ष्णमागमनं छर्दितस्य बीभत्सता स्वरभेदो गात्रसदनं परिदाहो मुखाद्धूमागम इव लोहलोहितमत्स्यामगन्धित्वमिव चास्यस्य रक्तहरितहारिद्रत्वमङ्गावयवशकृन्मूत्रस्वेदलालासिङ्घाणकास्यकर्णमलपिडकोलिकापिडकानामङ्गवेदना लोहितनीलपीतश्यावानामर्चिष्मतां च रूपाणां स्वप्ने दर्शनमभीक्ष्णम्** (चनि. २.६) **लक्षणम्–ऊर्ध्वगरक्तपित्तस्य–बहुश्लेष्मणि शरीरे श्लेष्मसंसर्गादूर्ध्वं प्रतिपद्यमानं कर्णनासिकानेत्रास्येभ्यः प्रच्यवतेऽधोगे तु बहुवाते शरीरे वातसंसर्गादधः प्रतिपद्यमानं मूत्रपुरीषमार्गाभ्यां प्रच्यवते। उभयगे तु बहुश्लेष्मवाते शरीरे श्लेष्मवातसंसर्गाद् द्वावपि मार्गौ प्रतिपद्यते। तौ मार्गौ प्रतिपद्यमानं सर्वेभ्य एव यथोक्तेभ्यः खेभ्यः प्रच्यवते शरीरस्य** ( चनि. २.८) **उपद्रवाः–दौर्बल्यारोचकाविपाकश्वासकासज्वरातीसारशोफशोषपाण्डुरोगाः स्वरभेदश्च** ( चनि. २.७) **रिष्टलक्षणानि–यत्कृष्णमथवा नीलं शक्रधनुष्प्रभं वा तथा यद्वाससो रञ्जनमतिमात्रं पूतिभृशं सर्वोपद्रवयुक्त बलमांसक्षयसहितं तदसाध्यम्** ( चनि. २.२३-२६ ) **चिकित्सासूत्रम्–सन्तर्पणोत्थं बलिनो बहुदोषस्य नरस्य रक्तपित्तमूर्ध्वगं विरेकेण साधयेदधोगतं तु वमनेन, अपतर्पणोत्थं रक्तपित्तं दुर्बलस्याल्पदोषस्योर्ध्वगं शमनैरधोगं बृंहणैरुपाचरेदूर्ध्वगे तिक्तकषायकौ रसौ शमनार्थे प्रयुञ्जीत। अधोगे मधुरो रसो बृंहणार्थे देयः** (अहृचि. २.५-७)

**रक्तपित्त-लक्षण**— पित्ताचा रक्ताशी संसर्ग झाल्यामुळे, रक्त दुष्टीने, रक्ताचा वास व रंग त्याला असल्यामुळे त्याला रक्तपित्त असे म्हणतात. **पौराणिक उत्पत्ति**—दक्षाच्या यज्ञाच्या नाशाच्या वेळी रुद्राच्या क्रोध व अभिनिवेशरूपी अग्नीने प्राण्यांच्या शरिरातील प्राणांना दुष्ट करून ज्वर व त्यानंतर रक्तपित्त उत्पन्न केले.

**संप्राप्ति**— पित्तप्रकोपक कारणांनी प्रकुपित पित्त शरिरात पसरून जेव्हा यकृत व प्लीहा यांतून उत्पन्न होणाऱ्या रक्तवाही स्रोतसांचा, प्रमाणाने वाढलेल्या रक्तप्रवाहाने दाब व ताण यांनी विस्तृत झालेल्या तोंडाजवळ येऊन रोध करते–अडवते तेव्हाच रक्ताची दुष्टि होते. **प्रकार**— तीन (१) नाक तोंड इत्यादि वरच्या मार्गातून बाहेर येणारे ते ऊर्ध्वग. (२) गुदादीमार्गाने येणारे ते अधोग व (३) दोन्ही मार्गांनी येणारे ते उभयग. **पूर्वरूपे**— अन्नाची अभिलाषा नसणे, अन्न आंबट होणे, आंबट रस–वास–ढेकर–ओकारी पुनःपुन्हा होणे, ओकारीने बाहेर आलेले पदार्थ किळसवाणे असतात, स्वर फुटीर, अवयवांचा गळाठा, अवयवांच्या भोवताली आग, तोंडातून धूर आल्यासारखे वाटणे, लोखंड– रक्त– मासे– आम– यांच्यासारखी तोंडाला घाण येते,

अंगे- अवयव- विष्ठा- मूत्र- घाण- लाळ- शेंबूड- तोंडाचा मळ- कानातला मळ- डोळ्यातला मळ- ही तांबडी, हिरवी, पिवळी होणे, अंगात वेदना, लाल- निळे- पिवळे- काळे तसेच ज्वालायुक्त पदार्थ स्वप्नात सारखे दिसणे.

**लक्षणे— ऊर्ध्वगरक्तपित्त—** कफाधिक्य असलेल्या शरिरात कफाच्या संसर्गाने दोष वरील अवयवात येऊन कान, नाक, नेत्र, तोंड, यातून स्रवते. **अधोगरक्तपित्त**—वाताधिक्य असलेल्या शरिरात वाताच्या संसर्गात अधोभागी दोष येऊन मूत्र, मळ व योनिमार्गातून स्रवते. **उभयग रक्तपित्त**—वात-कफाधिक शरिरात कफवात संसर्गामुळे दोष दोन्ही मार्गात जाऊन स्रवते. हे रक्तपित्त सर्व शरिरांतील छिद्रातून स्रवते. **उपद्रव**- दुर्बलता, अरुचि, अपचन, श्वास, खोकला, ताप, अतिसार, सूज, शोष, पांडुरोग, व स्वर फुटीर होणे. **मरण दर्शक चिन्हे**- जे काळे किंवा निळे अथवा इंद्रधनुष्यासारखे अनेक रंगाच्या छटांनी युक्त रक्त असते तसेच जे कपड्यावर पडले असता त्याचा डाग ते धुतल्यावर निघत नाही. अतिशय दुर्गंधी, सर्व उपद्रवांनी युक्त बलमांस क्षययुक्त, असेल ते रक्तपित्त असाध्य. **चिकित्सासूत्र- शोधन**— पौष्टिक आहार विहारजन्य, पुष्कळ दोष असलेले, बलवान रोग्याचे ऊर्ध्वगत रक्तपित्त रेचकाने व अधोगत वमनाने साध्य करावे. **शमन**— अपौष्टिक आहार विहाराने झालेल्या दुर्बल माणसांचे थोड्या दोषांनी झालेले ऊर्ध्वग रक्तपित्त शमनांनी व अधोग पौष्टिक आहारविहारांनी शमवावे. शमनाकरिता कडु व तुरट रस ऊर्ध्वग रक्तपित्तात व पौष्टिक म्हणून गोड रस अधोग रक्तपित्तात वापरावा.

**–पित्तचिकित्सित**–न., **अध्यायसंज्ञा०** ( चचि. ४.१; अहृचि. २ ) या नावाचा अध्याय.

**–पित्तनिदान**–न., **अध्यायसंज्ञा०** ( चनि. २; अहृनि. ३ ) या नावाचा अध्याय.

**–पित्ताङ्कुश**–पु., **योग०** **पारदो हिङ्गुलः कुक्कुटाण्डरसो टङ्कणं गन्धकश्चेति सर्वं समभागं घृतेन परिमर्दयेत्। अनुपानं जीरकक्वाथः। मर्यादादिनत्रयम्। मात्रा–माषः, अयं ग्रहणीरक्तपित्तघ्नः** ( र. १३.९-१३ ) या नावाचे सिद्धौषध. पारा, हिंगूळ, गंधक, समभाग एकत्र खलून नंतर टाकणखार, कोंबड्याचे अंड्याचा बलक हीं द्रव्ये तितकीच घेऊन तुपाबरोबर खलावीत, जिऱ्याच्या काढ्याबरोबर तीन दिवस द्यावा. हा ग्रहणी, रक्तपित्त हारक आहे. प्रमाण १ मासा.

**–पुष्प**–पु., **वनस्पति० करवीरः** ( ध. ४.२ ) लाल कण्हेर.
**अपामार्गः** ( ध. १.२६३ ) लाल आघाडा.
**अगस्त्यः** ( र. २७.३३ ) लाल अगस्ति.
**बन्धूकः** ( रापरि. १०.३५ ) दुपारी.
**पुंनागः** ( रापरि. १०.११ ) उंडीण. तांबडे फूल व तांबडे केसर असणारी वनस्पती.
**पलाशः** ( ध. ५.१६१ ) लाल पळस.

**–( पुष्पा )**–स्त्री., **वनस्पति० शाल्मली** (ध. ५.१२७) तांबडी सावरी.

**–( पुष्पी )**–स्त्री., **वनस्पति० आवर्तकः** (रा. ३.२९३ ) चांभारआवळी,
**जपा** ( र. १५.२५-२८ ) तांबडी जास्वंद.
**करुणी** ( रापरि. १०.२७ ) ग्रीष्मऋतूत लाल फुले येणारी वनस्पती.
**उष्ट्रकाण्डी** ( रापरि. १०.४३ ] लाल फुलांची कांडी असलेली वनस्पती.

**–पुष्पक**–पु., **वनस्पति० पर्पटः** ( रा. ५.६६ ) पित्तपापडा.
**शाल्मली** ( ध. ५.१२७ ) तांबडी सावरी.

**–( पुष्पिका )**–स्त्री., **वनस्पति० विष्णुक्रान्ता** ( ध. ४.११५ ) बारीक पाने व लाल फुलांची विष्णुक्रांता.
**पुनर्नवाभेदः क्रूरः** ( रा. ५.४०७ ) द्र० **'पुनर्नवा'** लाल पुनर्नवा.
**भूपाटली** ( रापरि. ५.४३ ) भुईपाडळ.
**पाटला** ( रा. ९.१५० ) पाडळ.

**–पूरक**–न., **वनस्पति० वृक्षाम्लम्** (ध. २.९५) चिंच.

**–प्रतिषेध**–पु., **अध्याय०** ( सुउ. ४५ ) या नावाचा अध्याय.

**–प्रसव**–पु., **वनस्पति० कुरुबकः** ( रा. १०.४१२ ) कोरांटी.
**मुचुकुन्दः** (रापरि. १०.२५) एक सुगंधी वृक्ष.

**–फल**–पु., **वनस्पति० शाल्मली** ( रा. ८.२१२ ) सावरी.
**वटः** ( ध. ५.७६ ) वड.

**-( फला )**-स्त्री., वनस्पति० बृहतीभेदः बृन्ताकी ( रा. ७.१२८ ) द्र० ' बृहती ' डोरली.
**बिम्बी** ( ध. १.२०२ ) लाल तोंडली.

**-बिन्दु**-पु., वनस्पति० अपामार्गः ( रा.४.३९० ) लाल आघाडा.

**-बिन्दुचिताङ्ग**-वि., रक्तबिन्दुव्याप्तशरीरः (बालः) जन्तुकार्दितबालस्य लक्षणम् ( कासू. २५.३९ ) रक्ताचे बिंदु सर्वांगावर असलेला बालक. जंताच्या उपद्रवाने पीडित बालकाचे लक्षण

**-बीज**-पु., वनस्पति० दाडिमः (ध.२.६१) डाळिंब.

**-बीजका**-स्त्री., वनस्पति० तरटी ( रापरि. ८.३२ ) तरडी.

**-भेदन**-न., रक्तस्रावणम् ( सुउ. ४२.२० ) रक्तस्रुति, रक्तस्राव.

**-मण्डल**-न., लक्षण० रक्तवर्णं मण्डलम् ( सुचि. ५.४ ) चत्वारिंशत्पित्तविकारेष्वेकः ( चसू. २०.१४ )
अंगावर लाल चट्टे उठणे. चाळीस पित्तरोगांपैकी एक.
पु., मण्डलिसर्पः ( सुक. ४.३४ ( २ ) सापाचा प्रकार.

**-( मण्डला )**-स्त्री., कीट० गलगोलिका (सुक. ८.२९) गलगोलिका, एक किडा.

**-मत्ता**-वि., रक्तपानेन मत्ता ( जलौका ) ( अहसू. २६.३९ ) रक्त पिऊन मत्त झालेली जळू.

**-मद**-पु., रोग० रक्तजन्यो मदः ( अहसू.२६.४४ ) रक्तापासून आलेला मद.

**-मारिष**-पु., शाक० रक्तश्वेतभेदाद्द्विविधः, गुणाः-मधुरः शीतो विष्टम्भी गुरुः पित्तनुद्विषमाग्निजित् ( र. १८.१३९-४१ )
लाल तांदुळजा. गोड, शीत, जड, अवष्टंभक, पित्तशामक, विषम अग्नि जिंकणारा.

**-मार्ग**-पु., शारीर० रक्तस्य मार्गः, सिरास्रोतोधमन्यादिः ( चचि. २९.३५ )
रक्ताचा मार्ग. शिरा, स्रोतसे, धमनी इत्यादी.

**-मूलक**-पु., वनस्पति० देवसर्षपकः ( रापरि. ९.४२ ) मोहरी.

**-मूला**-स्त्री., वनस्पति० लज्जालुः ( रा. ५.१६१ ) लाजाळू.

**-मूली**-स्त्री., वनस्पति० समङ्गा ( चसि. १०.३१ ) लाजाळू, मंजिष्ठा,

**-मेह**-पु., रोग० प्रमेहः, शोणितजो व्याधिः ( चसू. २४.१२ )
रक्ताच्या दुष्टीने होणारा प्रमेहाचा प्रकार.

**-मोक्षण**-न., रक्तस्रावविधिः ( चसू. ७.१५ ) उपक्रम० ( चसू. २३.८ ) दुष्टरक्तनिर्हरणार्थमुपयुज्यते, तस्य साधनानि सिराव्यधो विषाणमलाबुर्जलौका शस्त्रपदं च; उत्तानं दुष्टरक्तं पदैरवगाढं जलौकोभिरवगाढतरं तुम्बैरवगाढतमं विषाणेन, सार्वाङ्गिकमवगाढतमं सिराव्यधेन च निर्हरेत् ( सुशा. ८.२५ ) तस्य महती मात्रा प्रस्थप्रमाणा प्रस्थश्चात्र सार्धत्रयोदशपलप्रमाणः ( सुक. ५.३१-३२ ड. )
रक्तस्रुतीचा विधि. चिकित्सेचा एक प्रकार. दुष्ट रक्त शरिरातून काढण्यासाठी केला जाणारा उपाय. थोडेसे आणि एकाच ठिकाणी, उथळ अशा ठिकाणचे रक्त फासण्या मारून, खोल जागेचे जळवांनी, त्यापेक्षा खोल असेल तर शिंग, तुंबडी ( भोपळा ) वगैरेनी आणि सर्व शरीरभर पसरलेले आणि अत्यंत खोल असेल तर सिराव्यध करून रक्त काढावे. जास्तीत जास्त रक्त ५४ तोळे काढावे. हे प्रमाण याच संदर्भात समजावे. प्रस्थ म्हणजे ६४ तोळे.

**-यष्टिका**-स्त्री., वनस्पति० मञ्जिष्ठा ( ध. १.१७ ) मंजिष्ठा.

**-यष्टी**-स्त्री., वनस्पति० मञ्जिष्ठा ( ध. १.१७ ) मंजिष्ठा.

**-यावनाल**-पु., वनस्पति० यावनालभेदः, तुवरयावनालः ( रा. १६.१७१ ) तांबडा जोंधळा.

**-योनि**-स्त्री., योनिरोग० असृग्दरः ( चचि. ३०.८६,८७ ) रक्तप्रदर.

**-रजस्**-न., भैषज्य० सुवर्णगैरिकम् ( ध. ३.१७० ) सोनकाव.

**-राजि**-पु., कीट० तस्य गुणाः-वायव्यो वातकोपनो वातविकारकारी ( सुक. ८.५-८ )
वातप्रकृतीचा कीटकविशेष. वातप्रकोपक, वातविकारकारी.

**-राजिमत्स्य**-पु., लोहितराजियुक्तो मत्स्यः ( सुक. ३.५ ) लाल रेषा असलेला माशाचा प्रकार.

**-राजी**-स्त्री., कीट० गलगोलिका (सुक. ८.२९) एक किडा,

**-रेणु**-पु., खनिज० **सिन्दूरम्** ( ध. ३.१०१ ) शेंदूर. **वनस्पति० पुंनागः** ( रापरि. १०.११ )
तांबडे व तांबड्या केसराचे फूल. नागकेसर, उडीद.

**-रैवतक**-न., **वनस्पति० पारेवतभेदः, महापारेवतम्** ( रा. ११.९० ) **द्र० 'पारेवत'** खजूर.

**-लक्षण**-न., लक्षण० **शुद्धार्तवलक्षणम्** ( सुशा. २.१८ ) शुद्ध रजासारखे ( रक्तासारखे )

**-ला**-स्त्री., **वनस्पति० काकादनी** ( रा. ३.४३ )
कावळी.
**मूर्वा** (रा. ३.१०) मोरवेल.

**-वर्ग**-पु., **द्रव्यगण० कुसुम्भं खादिरो लाक्षा मञ्जिष्ठारक्तचन्दनं रक्तशिग्रुर्बन्धुजीवः कर्पूरगन्धिनी स्वर्णमाक्षिकं चेति** ( र.१०.९१ )
रक्तवर्ग. ( रसशास्त्रातील ) करडईचे फूल, खैर, लाख, मंजिष्ठ, रक्तचंदन, तांबडा शेवगा, सुवर्ण माक्षिक, बंधुजीव, कर्पूरगंधिनी, ( कापूर, काचरी, आंबे हळद. )

**-वर्त्मक**-पु., **पक्षि० कुकुभभेदः स्थूलकुकुभः** ( चसू. २७.४७ ) एका जातीचा कोंबडा.

**-वर्षाभू**-स्त्री., **वनस्पति० पुनर्नवाभेदः, वसुकः** ( रा. ५.४०७ ) **द्र० 'पुनर्नवा'**
पुनर्नवा प्रकार. वसू.

**-वहस्रोतस**-न., **शारीर० रक्तधातुवहस्रोतः रक्तवहे द्वे स्रोतसी, तन्मूलस्थानं यकृत्प्लीहानौ, वहनस्थानं रक्तवाहिन्यश्च धमन्यः, विद्धस्य लक्षणं-श्यावाङ्गता ज्वरो दाहः पाण्डुता शोणितागमनं रक्तनेत्रता च** ( सुशा.९.१२ ) **दुष्टिहेतुः-विदाह्यन्नपानस्निग्धोष्ण-द्रवान्नपानातपानलाः** ( चवि. ५.१४ )
रक्तवह स्रोतस. ही दोन आहेत. रक्तधातूला वाहणारे स्रोतस त्याचे मूलस्थान यकृत, प्लीहा, वहनस्थान, रक्तवाही शिरा. **रक्तवहस्रोतस विद्ध झाल्याची लक्षणे**-आंग काळसर पडणे, ज्वर, दाह, अंगावर पांढुरकी येणे, रक्त येणे, डोळे तांबडे होणे. **रक्त दुष्टीची कारणे**-घशाशी जळजळणारे तेलकट तळकट खानपान, फार स्निग्ध, फार उष्ण, फार द्रव खानपान करणे, उन्हात हिंडणे, आणि विस्तवाशी अधिक संबंध येणे.

**-वात**-पु., रोग० **तल्लक्षणानि पादयोरभितापः शोथश्च शरीरे च रक्तच्छाया** ( र. २१.४४ )
या नावाचा रोग. लक्षणे— पायांची आग, सूज, व तोंडावर तांबडेपणा.

**-वारिज**-न., **वनस्पति० रक्तपद्मम्** ( रा.१०.२४१ )
रक्तकमळ.

**-वाहिनी**-स्त्री., **शारीर० सिराभेदः रक्तस्य वाहिनी स्थानं यकृत्प्लीहानौ, संख्या पंचसप्ततिशतम्** ( सुशा. ७.६; सुशा. ९.१२ )
सिरा, रक्त वाहणाऱ्या. स्थान— यकृत, प्लीहा. संख्या एकशे पंचाहत्तर.

**-विद्रधि**-पु., **स्त्रीरोगः आर्तवजन्यविद्रधिः, स्त्रीणा-मपप्रजातानां प्रजातानां वा अहितसेवनात्कुक्षौ दाहज्वरयुक्तो विद्रधिः** ( सुनि. ९.२६ )
रक्तविद्रधि, स्त्रीरोगांपैकी एक. रजाच्या विकृतीने होणारे-गर्भाशयात होणारे गळू. गर्भपात किंवा बाळंत झालेल्या स्त्रीने अहितसेवन केल्याने गर्भा-शयात दाह व ज्वरयुक्त गळू होते.

**-विस्फोट**-पु., रोग० **चत्वारिंशत् पित्तविकारेष्वेकः, रक्तजा पिडका** ( चसू. २०.१४ )
पित्तरोगांपैकी एक. अंगावर लाल फोड उठणे. विस्फोट, फोड.

**-विस्रावण**-न., **उपक्रम० रक्तमोक्षः, सर्पविषे श्रेष्ठ उपक्रमः** ( सुक. ५.१४-१५ )
रक्तमोक्ष, रक्तस्राव. सर्पविषावर श्रेष्ठ उपाय.

**-वृक्ष**-पु., **वनस्पति० रक्तचन्दनवृक्षः, तत्पुष्पशाक-गुणाः-कफपित्तहरं कुष्ठघ्नं च** ( सुसू. ४६.२८४ )
रक्तचंदनवृक्ष. त्याच्या फुलाच्या भाजीचे गुण— कफपित्तहारक, कुष्ठनाशक.

**-वृद्धि**-स्त्री., **रोग० मुष्कवृद्धिरोगभेदः, लक्षणम्-कृष्णस्फोटावृतां पक्वोदुम्बरसंकाशां ज्वरदाहोष्म-वतीमाशुसमुत्थानपाकां रक्तवृद्धिं वदन्ति** ( सुनि. १२.६ )
वृषणवृद्धि रोगातील प्रकार. **चिन्हे**— वृषणावर काळे फोड, पिकलेल्या उंबरसारखे वृषण, ज्वर, दाह, उकडणे, शीघ्रतेने उत्पत्ति व पिकणे.

**-शाकिनी**-स्त्री., **वनस्पति० रक्तसहचरी, रक्तपुनर्नवा, रक्तदण्डपत्रं मारीषशाकं वा** ( र. १८.१०७ )
तांबडी पुनर्नवा, लाल घेटूळी, तांदुळजा.

**-शालि**-पु., **वनस्पति० शालिः** ( ध. ६.६९ ) **शूकधान्यश्रेष्ठः** ( सुसू. २०.५ ) **व्रीहिविशेषः** ( रा. १६.८७ ) लाल साळ, लाल भात.

**-शाल्य**-पु., **वनस्पति० व्रीहिः** ( रा. १६.१०४ )
लाल तांदूळ.

**–शिग्रु**–पु., वनस्पति० शिग्रुः ( रा. ७.६६ )
लाल शेवगा.

**–शीर्षक**–पु., जलचरपक्षिविशेषः, सारसभेदः
( चसू. २७.४४ ) लाल डोक्याचा एक जलचर पक्षी.

**–ष्ठीवन**–न., ( परिव० ) लक्षण० लोहितस्य थूत्करणम् ( सुनि. १६.२०-२१ )
थुंकीतून रक्त जाणे.

**–ष्ठीविज्वर**–पु., रोग० संनिपातज्वरभेदः, तल्लक्षणम्– ज्वरवमितृषामोहशूलातिसारहिक्काऽऽध्मानभ्रमण-दवथुश्वाससंज्ञाप्रणाशाः रसना च विकृता श्यामा रक्ता मण्डलोत्थानरूपा; मर्यादा–दश दिनानि; व्याधिरयमसाध्यः ( मानिज्वर. २० ).
सन्निपात ज्वराचा भेद; लक्षणे– थुंकीतून रक्त, ज्वर, ओकारी, तहान, विचारशक्ति कमी होणे; शूल, अतिसार, उचकी, पोटफुगी, चक्कर, डोळ्यांची आग. श्वास, संज्ञानाश, जीभ–काळसर, लाल चट्टे असलेली. मुदत–दहा दिवस. रोग असाध्य.

**–सर्षपक**–पु., वनस्पति० राजिका ( ध. ४.६० )
लाल मोहरी.

**–सहाख्य**–पु., वनस्पति० कुरुबकः (रा.१०.४१२)
लाल कोऱ्हांटी.

**–सार**–पु., धातुसारविशेषः, अयं स्निग्धताम्रनख-नयनतालुजिह्वौष्ठपाणिपादतलः(सुसू. ३५.१६; चवि. ८.१०६ )
रक्तसार. हा स्निग्ध व तांबडी नखे, डोळे, टाळु, जीभ, ओठ, हात, पाय तळ असलेला.
वनस्पति० अम्लवेतसः (रा. ६.१४७) आम्लवेतस.
खदिरः ( ध. १·२५ ) खैर.
रक्तचन्दनम् ( ध. ३.४ ) रक्तचंदन.

**–सारमुख**–पु., वनस्पति० व्रीहिः ( ध. ६.७२ )
लाल भात.

**–स्थापन**–वि., रक्तं प्रच्युते रक्षति इति रक्तस्तम्भकम् ( चचि. ३०.८७ ) रक्तस्तंभक, रक्तस्राव थांबवणे.

**–स्रव**–पु., नेत्ररोग० रक्तात्ताम्रं बहूष्णं चाश्रु संस्रवेत् ( असंउ. १३ )
नेत्ररोग. यात डोळ्यातून तांबडे व फार उष्ण अश्रु गळतात.

**–स्राव**–पु., नेत्ररोग० रक्तस्रावः ( सुउ. १.३६ )
नेत्ररोग. यात रक्तस्राव होतो.

**–स्राविन्**–पु., वनस्पति० अम्लवेतसः ( ध. २.९६ )
अम्लवेतस,

**–स्रुति**–स्त्री., लक्षण० रक्तस्रावः ( अहसू. ११.३० )
रक्तस्राव.

**रक्तक**–पु., वनस्पति० चन्दनभेदः, रक्तचन्दनम् ( रा. १२.१२ ) द्र० 'चन्दन' लाल चंदन.
शिग्रुः ( ध. ४.४० ) शेवगा.
रक्तशिग्रुः (रा. ७.६६) लाल शेवगा.
अशोकः ( ध. ५.१५९ ) अशोक.
न., प्राचीनामलकम् ( ध. १.२१८ ) पान आवळी.
न., खनिज० ताम्रम् ( ध. ६.९ ) तांबे.

**रक्ताक्ष**–वि., लक्षण० रक्तनेत्रः ( असंशा. २ )
डोळे लाल असलेला.

**रक्तागम**–पु., रक्तनिर्गमनम् (सुउ. ४१.१२) रक्त जाणे.

**रक्तागस्त्य**–पु., वनस्पति० अगस्त्यः ( र. १८.४७-५२)
तांबडा आगस्ता.

**रक्ताङ्कुर**–पु., भैषज्य० प्रवालम् ( रा. १३.७३ ) प्रवाळ.

**रक्ताङ्ग**–पु., वनस्पति० अग्निमन्थः (ध. १.१११) अरणी.
कम्पिल्लकः ( ध. ३.१३८ ) कपिला.
भैषज्य० प्रवालम् ( रा. १३.७३ ) प्रवाळ.

**( रक्ताङ्गी )**–स्त्री., वनस्पति० मञ्जिष्ठा ( ध. १.१८ )
मंजिष्ठ.

**रक्ताङ्कुल**–न., वनस्पति० व्रीहिः (रा. १६.१०७ )
लाल भात.

**रक्तातिसार**–पु., रोग० सरक्तपुरीषातिविसर्गलक्षणः ( चसू. २.२१ ) पित्तातिसारिणोऽतिमात्रपित्तलान्न-पानादिसेवनाद्रक्तातिसारः प्रभवति, ततश्च ज्वर-शूलतृड्दाहा गुदपाकश्च जायते ( चचि. १९.७० )
रक्तातिसार. रक्तयुक्त मळ अति प्रमाणात होणे, सरणे. पित्तातिसारी जेव्हा पित्तल अन्नपान विहार अति करतो तेव्हा हा होतो व नंतर ज्वर, शूल तहान, दाह आणि गुद पिकणे होतात.

**रक्तात्मक**–पु., रोग० रक्तजशिरोरोगः ( सुउ. २५.८ )
रक्तामुळे होणारा शिरोरोग.

**रक्तानिलार्ति**–स्त्री., रोग० रक्तवातप्रधानो रोगः ( चसू. ३.२२ ) रक्तवातप्रधान रोग.

**रक्तानुगत**–वि., दुष्टरक्तसंबद्धः ( सुचि. ३.२३ )
दूषित रक्ताशी संबंधित.

**रक्तान्तनेत्र**–वि., नेत्रस्य प्रान्तभागे रक्तवर्णो यस्य, सः ( सुशा. ४.७४ )
ज्याच्या डोळ्याच्या कडा लाल आहेत असा,

**रक्तापामार्ग**-पु., वनस्पति० **अपामार्गः** ( र. ५.२५० )
तांबडा आघाडा.

**रक्तापह**-न.,वनस्पतिनिर्यास० **बोलम्** ( रा. ६.११६ )
बोळ.

**रक्ताभिपन्न**-पु., नेत्ररोग० **रक्ताभिष्यन्दः। लक्षणानि- ताम्राश्रुता लोहितनेत्रता समन्तादतिलोहितराज्यश्च दाहप्रपाकः शिशिराभिनन्दा धूमायनमुष्णाश्रुता पीतनेत्रता च** ( सुउ. ६.९ )
रक्तदोषाने डोळे येणे. लक्षणे- उष्ण व लाल अश्रु, लाल डोळे, भोंवताली लाल शिरांचे जाळे, डोळे पिवळे, आग, डोळा पिकणे, थंड पदार्थांची इच्छा, धूर निघाल्यासारखी पीडा होणे.

**रक्ताभिष्यन्दप्रतिषेध**-पु., अध्याय० ( सुउ. १२ )
या नावाचा अध्याय. रक्तदोषाने आलेल्या डोळ्याचे उपचार यात आहेत.

**रक्तामलान्तक**-पु., वनस्पति० **कुरुबकः** (रा. १०.४१२) लाल कोन्हांटी.

**रक्तामृत**-न., विषभेदः; **शुभं वर्णे यथोक्तवर्णं गन्धरस- स्पर्शसंपत्तिविशिष्टं नूतनं महाविषं रक्तशृङ्गीकमिति केचिद्वदन्ति** ( र. २१.११७-२० ) द्र० '**विष**'
विषाचा प्रकार. योग्य रंग, वास, रस, स्पर्श यांनी युक्त, नवे महाविष, यालाच रक्तशृंगीक असेही काही म्हणतात.

**रक्ताम्भोज**-न., वनस्पति० **रक्तपद्मम्** ( रा. १०.२४१ )
लाल कमळ.

**रक्ताम्र**-पु., वनस्पति० **क्षुद्राम्रः** ( रा. ११.६ )
लहान हलक्या जातीचा रानआंबा.

**रक्ताऽम्लान**-पु., वनस्पति० **कुरुबकः** ( रा. ४१२ )
लाल कोन्हांटी.

**रक्तालु**-पु., वनस्पति० **रक्तपिण्डालुः** ( रापरि. ७.२६ )
लाल रताळू. रताळू.

**रक्तालुक**-न., वनस्पति० **रक्तपिण्डालुः** (सुसू.४६.२९८)
लाल रताळे.

**रक्तावसेक**-पु., उपक्रम० **रक्तनिर्हरणम्** (चचि. ५.३२)
रक्त काढणे.

**रक्ताशय**-पु., आशयविशेषः **शोणितस्थानभूतौ यकृत्प्लीहानौ** ( सुसू. २२.९; सुशा. ५.८ )
रक्ताशय, यकृत व प्लीहा.

**रक्तास्राव**-पु., नेत्ररोग० **सरक्तोष्णप्रभूतनाति- सान्द्रस्रावयुक्तः; असाध्योऽयम्** ( सुउ. २.७ )
नेत्राचा विकार. रक्तयुक्त, ऊन, घट्ट व फार स्राव- युक्त. हा असाध्य.

**(रक्तिका)**-स्त्री., वनस्पति० **काकमाचीभेदः चूडामणिः** ( रा. ३.४७ ) द्र० '**काकमाची**' कावळीचा प्रकार.
राजिका ( रा. १६.९० ) मोहरी.

**रक्तिन्**-वि., रक्तदोषी (चसू. ५.४२) रक्त बिघडलेला.

**रक्तेक्षु**-पु., वनस्पति० **इक्षु०** (रा.१४.१८९) लाल ऊस.

**रक्तेर्वारु**-स्त्री., वनस्पति० **इन्द्रवारुणी** ( रा. ३.३७३ )
लहान कडु कवंडळ.

**रक्तैरण्ड**-पु., वनस्पति० **एरण्डविशेषः** ( ध. १.२९६ )
लाल एरंड.

**रक्तैरण्डतैल**-न., **अस्मिंस्तैक्ष्ण्यौष्ण्यादिगुणा एरण्डतैला- पेक्षया तीव्रतराः** ( अहसू. ५.५८ )
तांबड्या एरंडाचे तेल. हे साध्या एरंडतेलापेक्षा अधिक तीक्ष्ण उष्ण आहे.

**रक्तोत्पल**-न., रोग० **रक्तपद्मम्** (रा. १०.२४१)
लाल कमळ.

**रक्तोदर**-न., रोग० **रक्तगुल्मः** ( र. १८.७१ )
रक्तगुल्म.

**रक्तोदरकुठार**-पु., योग० **पारदजेपालादियुक्तः** ( र. १८.७१ )
या नावाचे सिद्धौषध. पारा, जयपाळ इत्यादि युक्त.

**रक्तोपसृष्ट**-वि., **रक्तदूषितः** ( सुनि. १६.९ )
रक्त दुष्टियुक्त.

**रक्षणी**-स्त्री., वनस्पति० **त्रायमाणा** ( रा. ५.३७९ )
त्रायमाण, रेचक वनस्पति.

**रक्षस्**-न., योनि० **रक्षांसि रावणानुचरादीनि** ( सुसू. ३१.३१ ड. )
राक्षसयोनि. भूत. रावणाचे सेवक वगैरे.
पु., प्राणि० **गवयः** ( ध. ६.३५ ) एक हरीण.

**(रक्षो-)ग्रह**-पु., ग्रह० **जुष्टलक्षणम्-मांसरक्तमाध्वी- कादिनानासुराविकारास्वादनेच्छा निर्लज्जत्वमति- नैष्ठुर्यं शौर्यं निद्रा बलं निशाविहारोऽशुचित्वं च** ( सुउ. ६०.१४ )
राक्षसग्रहाने पीडित. त्याची चिन्हे-मांसरक्त- माध्वीकादि मद्याच्या सेवनाबद्दल इच्छा, निर्लज्जत्व, अतिनिष्ठुरता, शौर्य, निद्रा, बल, रात्री संचार, घाणेरडेपणा.

**-घ्न**-वि., **रक्षसां विध्वंसकरम्** (सुचि. ३०.१४-१५ )
राक्षसांचा नाश करणारे.

पु., वनस्पति० सर्षपः ( रा. १६.६८) मोहरी.
श्वेतसर्षपः (सुउ. ६०.४९) पांढरी मोहरी.
**–घ्नधूप**–पु., वचादिद्रव्याणां धूपः, व्रणे बालरोगे चोपयुज्यते, शयनादावपि दौर्गन्ध्यनाशनार्थमुपयुज्यते (सुसू. ५.१७)
भूतघ्न–रक्षोघ्न वेखंड इत्यादी द्रव्यांचा धूप; व्रणावर बालरोगात भूतनाशक म्हणून व शय्या इत्यादी–वर दुर्गंधीनाशक.
**–( घ्नी )**–स्त्री., वनस्पति० वचा ( रा. ६.८ ) वेखंड.
सर्षपभेदः ( चचि. २३.७९ ) मोहरीप्रकार.
**–भय**–न., राक्षसभयम् (सुसू. ५.२०) राक्षसाचे भय.
**–हन्**–पु., निर्यास० गुग्गुलुः (रा. १२.८४) गुग्गुळ.
**रक्षा**–स्त्री., रक्षणविधिः (चशा. ८.४७) रक्षणविधी.
स्वस्त्ययनम् ( सुउ. २८.१० )
शुभ, कल्याणप्रद. पुण्याहवाचनासारखे कृत्य.
**–कल्प**–पु., रक्षया सहितः कल्पः ( सुक. १.१ )
दूषित नसलेल्या अन्नाचे रक्षण व विषादिदूषित अन्नाच्या परिणामापासून रक्षण करणारे औषधादि योग.
**–विधान**–न., निशाचरेभ्यो रक्षणम् ( सुचि. १.८; चशा. ८.४७)
भूतापासून रक्षण कसे करावे याचे उपचार.
**–शक्ति**–स्त्री., मन्त्रितद्रव्य० ( असंसू. ८ )
मंत्रवलेले पदार्थ.
**रङ्ग**–पु., वनस्पति० खदिरः ( रा. ८.४१ ) खैर.
नारङ्गः ( रा. ११.२४ ) मोसंबे.
न., खनिज० वङ्गम् ( ध. ६.१३ ) कथील.
**( रङ्गा )**–स्त्री., वनस्पति० मेदा ( रा. ५.१६१ ) मेदा.
**–काष्ठ**–न., वनस्पति० कुचन्दनम् ( रा. १२.१२ )
रक्तचंदन.
**–कुष्ठक**–पु., वनस्पति० हिमावली ( रापरि. ६.१८ )
वसु.
**–क्षार**–पु., खनिज० टङ्कणः ( रा. ६.२८ )
टांकणखार.
**–द**–पु., खनिज० टङ्कणः ( रा. ६.२८ ) टांकणखार.
निर्यास० खदिरसारः ( रा. ८.४१ ) काथ.
**–दायक**–न., खनिज० कङ्कुष्ठम् ( रा. १३.२०० )
कंकुष्ठ.
**–नायक**–न., खनिज० कङ्कुष्ठम् ( ध. ३.१४१ )
कंकुष्ठ.
**–पत्री**–स्त्री., वनस्पति० नीलिनी ( रा. ४.३५१ )
काळा दाणा.
**–पुष्पी**–स्त्री., वनस्पति० नीलिनी ( रा. ४.३५१ )
काळा दाणा.
**–मातृ**–स्त्री., वनस्पति० लाक्षा (ध. ३.८२) लाख.
**–योग**–पु., रङ्गयोजना ( सुचि. २७.४ ) रंगयोजना.
**रङ्गक**–पु., वनस्पति० भृङ्गराजः ( रा. ४.२० ) माका.
**रङ्गिणी**–स्त्री., वनस्पति० शतावरीभेदः ( रा. १.२९३ )
शतावरीप्रकार.
हरिद्रा ( ध. १.५५ ) हळद.
**रङ्गुलता**–स्त्री., वनस्पति० आवर्तकी ( रा. ३.२९६ )
चांभारआवळी.
**रजत**–न., खनिज० रौप्यम्, तत् त्रिविधं–सहजं खनिजातं कृत्रिममिति तत्र पूर्वपूर्वमुत्तमम् ( र. ५.२४; चचि. १.५८; ध. ६.५ )
चांदी, रुपे, तीन प्रकार– १ सहज २ खनिज, ३ कृत्रिम. त्यामध्ये पहिले पहिले चांगले.
**–प्रभ**–पु., वनस्पति० सोमभेदः (सुचि. २९.५ )
सोमाचा प्रकार.
**रजतोपल**–पु., खनिज० रौप्यमाक्षिकम् ( र. ३०.३५ )
रौप्यमाक्षिक.
**रजनक**–पु., वनस्पति० कम्पिल्लकः ( अहसू. १५.४५ )
कपिला.
**रजनी**–स्त्री., वनस्पति० हरिद्रा (सुचि. २८.३; ध.१.५४)
हळद.
**–चर**–पु., योनि० निशाचरः (चशा. २.१०)
रात्री संचार करणारे; राक्षस.
**–द्वय**–न., वनस्पति० पिण्डहरिद्रा दारुहरिद्रा च (ड.सुउ. ३९०.२३०) गाठीहळद आणि दारुहळद.
**–पुष्प**–पु., वनस्पति० करञ्जः, उदकीर्यः, (रा. ९.१८०) करंज.
**रजन्यादियोग**–पु., योग० वृश्चिकदंशे प्रच्छिते रजनीसैन्धवव्योषशिरीषफलपुष्पैश्चूर्णैर्दुष्टरक्तप्रवर्तनार्थं प्रतिसारणम् ( सुक. ८.६७-६८ )
रजन्यादियोग नांवाचे सिद्धौषध. विंचू चावला असतानां अगर रक्तस्राव ठीक होण्यासाठी उपयोगी पडते. ( हळद, सैंधव, सुंठ, मिरी, पिंपळी व शिरीषाची फलपुष्पे यांचे चूर्ण. )
**रजस्**–न., स्त्रिया आर्तवम् ( चशा. ४.७ )
आर्तव, स्त्रियांचा मासिक स्राव.

प्रकृतेस्त्रिगुणेष्वेको गुणः, अयमप्रीत्यात्मको दुःख-
रूपः प्रवृत्तिकर उपष्टम्भकश्चलो गुणः (सुशा. १.३)
प्रकृतीच्या तीन गुणांपैकी एक. हा प्रीतिविरहित
दुःखरूप प्रवृत्तिकर बलोत्पादक व चल मनाचा गुण.

**मानसदोषयोरेकः** ( चसू. १.५७ )
मनाच्या दोषांपैकी एक.

**अयोरजः** ( चचि. १६.८२ ) लोखंडाचा चुरा.

**मान० षड्यूकाः=१ रजः** (र.११.१) प्रमाण, रजःकण.

**चूर्णम्** ( र. २.४९ ) चूर्ण.

**धूलिः** ( सुउ. ५०.३ ) धूळ.

**क्षारयोः रजः** ( र. १५.६९ )
जवखार आणि सज्जीखार यांचे चूर्ण.

**अष्टरूपायाः प्रकृतेर्गुणः, प्राणेष्वेकः** ( सुशा. ४.३ )
आठ प्रकारच्या प्रकृतीचा गुण. बारा प्राणांपैकी एक.

**वनस्पति० पर्पट** ( ध. १.४५ ) पित्तपापडा.

**-( रजस् )-वला**-स्त्री., **मासिकरजःस्रावयुता स्त्री**
( चचि. ३०.१६५ ) **दृष्टार्तवा** ( सुउ.६१.५ )
विटाळशी, मासिक रजस्राव चालू असलेली स्त्री.

**-( रजः ) क्षय**-पु., **लक्षण० आर्तवक्षयः**
( चशा. २.३ ) रजाचा क्षय, आर्तवाचा क्षय.

**-पथ**-पु., **शारीर० योनिमार्गो योनिर्वा**
( असंउ. ३८.३१९ ) योनिमार्ग, किंवा योनि.

**-शूल**-पु., **लक्षण० आर्तवशूलः** ( र. २.१७५ )
आर्तवाचा शूल. रजःस्राव होण्याच्या काळातील शूल.

**( रजो ) दोष**-पु., **आर्तवदोषः** ( चचि. ३०.९५ )
आर्तवदोष. रजाचा दोष.

**( रजो ) नाश**-पु., **लक्षण० स्त्रीणां पुष्पनाशः,
आर्तवनाशः** ( अहृसू. १९.३ ) रजाचा नाश.

**( रजो ) बहुल**-वि., **रजोगुणप्रबलः रजोगुणभूयिष्ठः**
( सुनि. १.८ ) रजोगुणाधिक्य असलेला.

**( रजो ) वहसिरा**-स्त्री., **शारीर० सिरा० गर्भाशयगता
रजोवाहिनी नाडी** ( चचि. ३०.२०७ )
गर्भाशयातील रजोवाहिनी शीर.

**रजोद्भव**-पु., **वनस्पति० सर्जकः** (रा. ९.२०४.) राळ.

**रज्जु**-स्त्री., **मुञ्जबल्वजादिनिर्मिता व्रणबन्धनद्रव्येष्वेका,
सूत्रम्** (सुसू. १८.१६)
मुञ्जतृण, वल्कल वगैरेची व्रणबंधनाची दोरी.

**रञ्जक**-न., **रञ्जनकारकम् पञ्चपित्तेष्वेकम्**
(असंसू.२०.५) पाच पित्तापैकी एक. रंजक पित्त.

**यकृत्प्लीन्होःपित्तं रञ्जकोऽग्निःस रसस्य रागकृत**
(सुसू. २१.१०)
यकृत्प्लीहेतील पित्तम्हणजेच रंजकपित्तरूप अग्नि. तो
रसधातूला तांबडा रंग देतो.

**आमाशयाश्रितं पित्तं रञ्जकम्** ( अहृसू. १२.१३ )
रञ्जकपित्ताचे स्थान आमाशय होय.

**खनिज० हिङ्गुलम्** ( १३.४८ ) 'पित्त' हिंगूळ.

**खनिज० कान्तलोहभेदः** (ध. ६.२९)
कांतलोहाचा प्रकार.

**(रञ्जिका)**-स्त्री., **वनस्पति० भङ्गा** (ध.१.१३०) भांग.

**-पित्त**-न., **पञ्चपित्तेष्वेकम्** ( अहृसू. १२.१३ ) द्र०
'दोष', 'पित्त' रंजकपित्त, पांच पित्तांपैकी.

**रञ्जन**-पु., **वनस्पति० कम्पिल्लकः** (ध. ३.१८) कपिला.

**मुञ्जः** ( रा. ८.२०५ ) मुंजा, मोळ.

न., **रागद्रव्यम्** ( चशा. ८.१७ ) तांबडे द्रव्य.

**खनिज० हिङ्गुलम्** ( रा. १३,४७ ) हिंगूळ.

**यथाविधिसाधितेन सुवर्णादिबीजधातूनां जारणेन
जायमानस्य पारदस्य पीतादिवर्णः** ( र. ८.८६ )
शास्त्रोक्त विधीने सुवर्ण इत्यादी धातूंचे बीज
पाऱ्याला देऊन त्यांचे जारण केल्यावर पाऱ्याचा
उत्पन्न होणारा पिवळा इ० वर्ण.

**( रञ्जनी )**-स्त्री., **वनस्पति० जंतुकारी** ( ध. ४.८८ )
खाज-कुहिलीच्या फळासारखी पण तिरकी फळे
येणारी बारीक वेल.

**ताम्बूली** ( ध. परि. ३.३ ) विड्याचे पान.

**नीली** ( ध. १.२३२ ) काळा दाणा.

**हरिद्रा** ( रा. ६.७९ ) हळद.

**रञ्जनक**-पु., **वनस्पति० कट्फलम्** ( रा. ८.१०१ )
कायफळ.

**रञ्जिनी**-स्त्री., **वनस्पति० हरिद्रा** ( ध. १.५४ ) हळद.

**रणप्रिय**-न., **वनस्पति० उशीरम्** ( ध. ३.१४ )
काळा वाळा.

**रण्डा**-स्त्री., **वनस्पति० दन्ती** ( चक. १२.४ ) दांतीमूळ.

**रत**-वि., **तत्परः, मग्नः, आहितचित्तः** ( सुचि. ३७.६२ )
विशिष्ट ठिकाणी चित्त गढलेला. तत्पर, तन्मय, मग्न.

**(रती)**-स्त्री., **मान० एका गुञ्जा** ( र. १८.२०८ )
प्रमाण. एक गुंजा

**रतिकाम**-वि., **रतिरूपस्य काम्यार्थस्य प्रार्थिता**
( चचि. ९.२३ ) मैथुनाची इच्छा करणारा.

**रत्न**-न., **मणिः** ( सुचि. २४.६५ ) **नवरत्नानि-
मुक्ताफलं, हीरकं, वैडूर्यं, पद्मरागकं, पुष्परागं,
गोमेदं, नीलं, गारुत्मतं, प्रवालम्** ( ध. ७.८९ )

उत्पत्तिस्थानानि–खनिः सागरादयश्च (र. ४.३६-३७) तेषां शोधनम्–माणिक्यं जम्बीरादिनाऽम्लेन, मौक्तिकं जयन्त्यारसेन, विद्रुमं यवक्षारादि–क्षारवर्गेण, तार्क्ष्यं गोदुग्धैः, पुष्परागं कुलत्थक्काथयुक्तैः काञ्जिकविशेषैः, वज्रं–हीरकं तण्डुलीयजलैः, नीलमणिर्नीलिनीरसेन, गोमेदं गोरोचनाभिः, वैदूर्यं त्रिफलाक्काथैः शुध्यति (र. ४.६१-६५) तेषां मारणम्, वज्रं विनाऽष्टौ शेषरत्नानि समभागशिलागन्धकतालकैः सह लकुचद्रावेण संमर्दितैरष्टपुटैर्म्रियन्ते। (र. ४.६६) वज्रं मत्कुणरक्तेन सप्तवारं विलिप्तं विशोषितं कासमर्दरसपूर्णलोहपात्रे निवेशितं सप्तवारं परिध्मातं सत् म्रियते। (र. ४.४४-४५) तेषां प्रतिविधानम्– रामठादिसर्वं यत्नतः संमर्द्य गोलकं कृत्वा तन्मध्ये जातान्युत्तमानि नवरत्नानि क्षिपेत्। ततस्तं गोलकं भूर्जपत्रे स्थापयित्वा सूत्रेणावेष्ट्य पुनश्च वस्त्रेण सम्यग्वेष्टनं कृत्वा समस्ताम्लपदार्थसहितेन काञ्जिकेन पूर्णे घटे गोलकं दोलायन्त्रे स्थापयित्वा दिनत्रयपर्यन्तं तीक्ष्णाग्निना स्वेदयेत्, ततो दोलायन्त्राद् गोलकं गृहीत्वा, काञ्जिकेन क्षालयेत्। अनन्तरं तस्माद् रत्नाद् द्रुतिमाहरेत्। सा द्रुतिः रत्नतुल्यप्रभा। यस्य रत्नस्य या द्रुतिः, सा तद्रत्नवर्णा भवति (र. ४.६७-७२) प्रतिरत्ननियतनवग्रहनामानि–माणिक्यं रविः, मुक्ता सोमः, विद्रुमं भौमः, तार्क्ष्यं बुधः, पुष्पं गुरुः, भिदुरं शुक्रः, नीलं शनिः, गोमेदकं राहुः, वैडूर्यं केतुः (र. ४.६) रत्नधारणगुणाः–रक्षोघ्नमौजस्यमुत्तमं सौभाग्यकरं प्रीतिवर्धनं च (सुचि. २४.६४-६५) तथा धन्यं मङ्गल्यं श्रीमद् आयुष्यं व्यसनसूदनं हर्षणमोजस्यं काम्यं च (चसू. ५.९७)

रत्न, नऊ रत्ने-मोती, हिरा, वैडूर्य, पद्मराग, पुष्पराग, गोमेद, नीळमणि, गारुत्मत, (पाच) आणि प्रवाळ.

निर्माण होण्याचे ठिकाण काहींचे खाणीमध्ये व काहींचे महासागरात असते. औषधात त्याचा उपयोग करतांना करावे लागणारे शोधन (१) मोती जयन्तीच्या रसात, (२) हिरा तांदुळज्याच्या काढ्यात (३) वैडूर्य त्रिफला काढयात (४) पद्मराग गाईच्या दुधात (५) पुष्पराग कुळथाच्या काढयात किंवा कांजीत (६) गोमेद गोरोचनामध्ये (७) नीलमणि काळचा दाण्याच्या स्वरसामध्ये (८) गारुत्मत लिंबाच्या रसात (९) प्रवाळ यवक्षार किंवा क्षारवर्गाने. तसेच औषधिकरणासाठी मारणसंस्कार करावा लागतो.

हिऱ्यावाचून आठ रत्ने समभाग मनशीळ व गंधक आणि हरताळ यांच्या सह ओटीफळ किंवा लिंबूच्या रसात खलून आठ पुटे द्यावीत. भस्म होते. हिरा ढेकणाच्या रक्ताचा लेप सातवेळा देऊन सुकवून कासविंद्याच्या रसात लोखंडाच्या लहान कढईत ठेवून तो रस आटवून नंतर जाळून पुनः पुन्हा सातवेळ करावे म्हणजे भस्म होते.

द्रुति. द्रुतीचाही उपयोग करतात. द्रुति महत् प्रयासाने व भाग्याने साधते.

औषधीकरणाशिवाय नवरत्ने ही नवग्रह म्हणून शरिरावर धारण करण्याची पद्धती आहे. (१) रवीकरिता माणिक्य (२) चंद्राकरिता मोती (३) मंगळाकरिता–पोवळे (प्रवाळ) (४) बुधाकरिता तार्क्ष्य (५) गुरूकरिता पुष्पराग (६) शुक्राकरिता–भिदुर (७) शनीकरिता नीलमणी (८) राहूकरिता गोमेद आणि (९) केतूकरिता वैडूर्य.

रत्नधारण हे उत्तम. भूतादि नाशक, ओजोवर्धक, सौभाग्यकर, प्रीतिवर्धक, मंगलकारक, शोभादायक, धन्यकर, आयुष्यवर्धक, हर्षदायक, रोगनाशक, कामनेला हितकर आहे.

**खनिज० हीरकम्** (ध. ६.५६) हिरा.

**प्रवालम्** (र. २३.४०) प्रवाल.

**मौक्तिकम्** (र. २३.४०) मोती.

**–करण्डक**–पु., पारदयोग० भूनागाभ्रकसत्वकान्तादिसिद्धः, अयं शूलज्वरग्रहणीकासनाशकः (र. १३.३६)

रत्नकरण्डक नावाचे सिद्धौषध. पारा, गांडूळ, अभ्रक याचे सत्व इ० युक्त हा योग शूल, ज्वर, ग्रहणी, खोकला नाशक.

**–केतुधारिणी**–स्त्री., मंत्रविद्या० रत्नकेतुनाम्ना धारिणीति सौगतादीनां नाम बौद्धादीनां या प्रसिद्धा सा (इन्दुः असंउ. १)

रत्नकेतु नावाची मंत्रविद्या. ही बौद्ध इत्यादींची धारणी नावाची मंत्रविद्या आहे.

**–कोश**–पु., सप्तविंशतिसंख्याकेष्वन्यतमो रससिद्धिप्रदायकः आचार्यः (र. १.२-५)

रससिद्धी देणाऱ्या २७ आचार्यांपैकी एक.

**-घोष**-पु., प्राचीनो रसाचार्यः अयं सप्तविंशति-रसाचार्याणामेकतमः ( र. ६.४९-५३ )
सत्तावीसांपैकी एक रसाचार्य.

**रत्नाकर**-पु., भैषज्य० समुद्रफेनः ( र. २३.३९ )
समुद्रफेन.

**रत्नाभरणधारण**-न., रत्नालङ्कारधारणम् इदं धन्य-त्वादिकरम् ( चसू. ५.९७ ) 'द्र० रत्न'
रत्नाचे दागिने अंगावर घालणे.

**रथ**-पु., यानम्, प्रवहणम् (असंसू. ८.४३) रथ, वाहन.
वनस्पति० तिनिशः ( रापरि. ९.२४ ) तिवस.

**-कार**-पु., लोहकारः ( सुचि. ५.१८ )
लोहार, रथ घडविणारा.

**-क्षोभ**-पु., यानयात्राजन्यक्षोभः ( चसि. १२.१४(४) )
रथाच्या प्रवासाने निर्माण झालेला क्षोभ.

**-चर्या**-स्त्री., रथेन गमनं नाम पर्यटनम् ( सुचि. ११.११ ) रथाने प्रवास करणे.

**रथाक्ष**-पु., रथस्य चक्राधारः ( असंसू. ३.५७ )
रथाच्या चाकांचा आधार ( आख ).

**रथाङ्ग**-पु., वनस्पति० तिनिशः (रापरि. ९.२४) तिवस.
न., चक्रम् ( सुक. ४.२२ ) चाक.
वनस्पति० ऋद्धिः ( ध. १.१४५ ) ऋद्धि. अष्टवर्गापैकी एक.

**( रथाङ्गी )**-स्त्री., वनस्पति० ऋद्धिः ( ध. १.१४५ )
ऋद्धि. अष्टवर्गापैंकी एक.

**रथक**-न., त्रिचक्रयुक्तो बालरथः स च बालानां गमनाभ्यासोपयोगी ( काचि. फक्कचि. )
तीन चाकांची लहान मुलांची गाडी, पांगुळगाडा.

**( रथिका )**-स्त्री., वनस्पति० तिनिशः ( रापरि. ९.२४ )
तिवस.

**रथ्या**-स्त्री., मार्गः ( चचि. ९.२० ) मार्ग.

**रदन**-पु., शारीर० दन्तः ( असंशा. ११.३ ) दात.

**रदित**-न., दंश० अयं विलिखितोऽनवगाढश्च सर्पदंशः ( ड. सुक. ४.१७ )
केवळ खरचटलेला व वरवर असलेला सर्पदंश.

**रन्ध्रकण्ट**-पु., वनस्पति० जालबर्बुरः (रापरि. ८.१४)
मोठ्या काट्यांचा बाभूळ.

**रन्ध्रण**-न., बन्धनम् ( र. १०.५ ) पारदादिबन्धनम् ( र. ९.६७ )
पारा इत्यादिकांचे घनस्वरूप करणे. पारा घट्ट करणे.



**रन्ध्रपत्र**-पु., वनस्पति० नलः ( रा. ८.२२२ ) नळ.

**रन्ध्रवंश**-पु., वनस्पति० वंशः (रा. ७.२१६)
वेळू, पोकळ बांबू, कळक.

**रन्ध्राण**-न., बन्धनम् ( र. १०.५ ) बन्धन.

**रन्ध्री**-स्त्री., वनस्पति० नलः ( ध. ४.१४१ ) नळ.

**रपक्ष**-पु., वनस्पति० भृङ्गराजः ( रा. २०.२२२ )
भांगरा, माका.

**रमण**-पु., वनस्पति० कैडर्यनिम्बः ( रा. ९.४८ )
पांढरा महानिंब. पर्वतनिंब, महारुख.

**रम्भा**-स्त्री., वनस्पति० कदली ( ध. ४.७५; र, २०.१७६ ) केळ.

**रम्यक**-पु., वनस्पति० महानिम्बः ( सुसू. ३८.२९-३०, ध. १.३१ )
महानिंब. द्रेका हेही याच वृक्षाचे नाव आहे.
न., पटोलमूलम् ( सुसू. ३९.४ )
कडु पडवळाचे मूळ.

**रम्यपुष्प**-पु., वनस्पति० शाल्मली ( रा. ८.२१२ )
सावरी.

**रम्यफल**-पु., वनस्पति० कारस्करः ( रापरि. ९.३५ )
कुचला.

**रम्या**-स्त्री., वनस्पति० विशाला ( रा. ३.३७५ )
मोठे इंद्रावण, घोड इंद्रावण.
पद्मिनी ( रा. ५.१३२ ) कमलिनी.

**रल्लक**-पु., प्राणि० अस्य जिह्वामुखमण्डितिकाजुष्टस्य धारयितुमुपयुज्यते ( इन्दु. असंउ. ६०.५७ )
हरिण. याची जीभ मुखमंडिका रोग्याला धारण करण्यास उपयुक्त.

**रव**-पु., वनस्पति० तिन्दुकः (रा. ११.४०) टेंभुरणी.

**रवक**-पु., रेणुः सत्वकणः ( र. २.३४; र. ५.२३० )
धातूंच्या सत्वाचा कण.

**रवि**-पु., खनिज० ताम्रम् ( र. ५.१६६ ) ताम्र, तांबे.
वनस्पति० अर्कः ( ध. ४.१३ ) रुई.

**-जधर**-पु., भैषज्य० रविजो यमः तं धरति धारयति इति रविजधरो महिषः तत्पर्यायत्वात् महिषो गुग्गुलुर्ज्ञेयः महिषः गुग्गुलुः ( र. ३०.५७ )
म्हशा गुग्गुळ. रवि, सूर्य, रविज सूर्यपुत्र, रविजधर, सूर्यपुत्राला वाहक म्हणजे महिष. त्याचे नावाचा गुग्गुळ तो म्हशा गुग्गुळ.

**-तप्ततोय**-न., रविणा तप्तं जलम् (चचि. १२.६७)
सूर्यकिरणाने तापलेले पाणी.

**–ताण्डव**–पु., पारदयोग० पारदगंधकताम्रादि-सिद्धोऽयं भगन्दरनाशकः ( र. २४.१२४ ) रविताण्डव नावाचे सिद्धौषध. भगंदरनाशक. पारा, गंधक, तांबे इत्यादियुक्त.

**–प्रिय**–न., वनस्पति० रक्तपद्मम् ( रा. १०.२४१ ) तांबडे कमळ.

**–लौह**–न., खनिज० ताम्रम् ( रा. १३.११ ) तांबे.

**–वल्ली**–स्त्री., वनस्पति० आदित्यवल्ली (असंउ. १.१४) आदित्यवल्ली. सूर्यवेल.

**रवीष्ट**–पु., वनस्पति० नारङ्गः ( रा. ११.२४ ) मुसुंबे.

**( रवीष्टा )**–स्त्री., वनस्पति० सुवर्चला आदित्यभक्ता ( रा. १४.४ ) ब्राह्मी. सूर्यभक्ता.

**रश्मि**–पु., किरणः ( र. २.३२ ) किरण.

**–जाल**–न., खनिज० रौप्यम् ( ध.६.६ ) रुपे, चांदी.

**रस**–पु., जलम् ( रा. १४.३१८ ) पाणी.

क्वाथः ( चचि. ७.१३१ ) काढा.

स्वरसः ( र. २.१९ ) अंगरस.

मांसरसः ( चसि. १.११ ) मांसरस.

अभिरुचिः ( १.५७ ) गोडी, आवड.

वनस्पति० इक्षुरसः, इक्षुः ( चसू. २७.२३७ ) उसाचा रस.

जातिपत्ररसः, जातिपत्रं ( ड. सुउ. १७.१२-१३ ) जाईच्या पानांचा रस.

आमलकीपत्ररसः, आमलकी (सुउ. १७.१२-१३) आवळीच्या पानांचा रस.

भैषज्य० बोलम् ( ध. ३.६२; चचि. २८.१५२ ) बोळ.

खनिज० पारदः ( र. १.६६ ) पारा.

रसकम् ( र. १२.१६० ) कलखापरी.

सिल्हकम् ( र. २२.१६७ ) धूप, ऊद.

शिलारसः ( र. २२.१६७ ) शिलारस.

आहाररसः ( चसू. २८.४ ) आहाररस.

शारीरधातु० सप्तधातुष्वेकः, रसधातुः ( चसू. १३.१४ ) अन्नजन्यः प्रथमो देहधातुः ( चचि. १५.१७ ) रस नावाचा धातु. आहारापासून निर्माण झालेला पहिला शारीर धातु.

रसनाग्राह्यो गुणस्तस्य जलं योनिः ( सुसू. ४२.३ ) मधुराम्ललवणतिक्तकटुकषायाः षड्रसाः; तदुत्पत्तिः–पृथिव्युदकाभ्यामुल्बणाभ्यां मधुररसस्य, तेजःपृथिवीभ्याममम्लस्य, उदकतेजोभ्यां लवणस्य, वाय्वाकाशाभ्यां तिक्तस्य, तेजोवायुभ्यां कटुकस्य, वायुपृथिवीभ्यां कषायस्योत्पत्तिर्भवति ( अहसू. १०.१ ) तेषां रूपाणि–तत्र मधुररसरूपम्–वक्त्रमनुलिम्पत्यास्वाद्यमानो देहस्य ह्लादनोऽक्षप्रसादनः पिपीलिकादीनां प्रियः च; अम्लरूपम्– मुखक्षालनः रोमहर्षणो दन्तहर्षणोऽक्षिभ्रुवनिकोचनः; लवणरूपम्–आस्यं स्यन्दयति कपोलगलदाहं च करोति; तिक्तरूपम्–आस्यं विशदयति, रसनां प्रतिहन्ति; कटुरूपम्–जिह्वाग्रमुद्वेजयति, चिमिचिमां कुर्वन्नक्षिनासास्यं स्रावयति, कपोलौ दहति; कषायरूपं–जिह्वां जडयेत्, कण्ठस्रोतोविबन्धं च कुर्यात् (अहसू.१०.२-६ ) तद्विपाकाः–मधुरलवणयोर्मधुरो विपाकः; अम्लस्य अम्ल एव, कटुतिक्तकषायाणां कटुः ( अहसू. ९.२१ ) तेषां वीर्याणि–शीतवीर्यरसाः–मधुरस्तिक्तः कषायश्च; उष्णवीर्याः अम्लो लवणः कटुः; तेषां गुणाः–स्निग्धरसाः–मधुराम्ललवणाः, रूक्षरसाः–तिक्तकटुकषायाः; गुरुरसाः–मधुरलवणकषायाः, लघुरसाः– अम्लकटुतिक्ताः ( अहसू. १०.३७-३९) तेषां कर्माणि–मधुररसस्य कर्माणि–सप्तधातुवर्धनः ओजः स्तन्यवर्धनश्चक्षुष्यः केश्यो वर्ण्यो बलकृत् संधानो रसरक्तप्रसादनो बालवृद्धक्षतक्षीणहितस्तृष्णामूर्च्छादाहप्रशमनः षडिन्द्रियप्रसादनः कृमिकरश्च; अम्लकर्माणि–जरणो दीपनः पाचनः पवननिग्रहणोऽनुलोमनः कोष्ठविदाही, बहिःशीतः क्लेदनः प्रायशो हृद्यश्च; लवणकर्माणि–संशोधनः पाचनो विश्लेषणः क्लेदनः शैथिल्यकृदुष्णः सर्वरसप्रत्यनीको मार्गविशोधनः सर्वशरीरावयवमार्दवकरश्च; कटुकर्माणि–दीपनः पाचनो रोचनः शोधनः स्थौल्यालस्यकफकृमिविषकुष्ठकण्डूप्रशमनः सन्धिबन्धविच्छेदनोऽवसादनः स्तन्यशुक्रमेदसामुपहन्ता च; तिक्तकर्माणि–छेदनो रोचनो दीपनः शोधनः कण्डूकोठतृष्णामूर्च्छाज्वरप्रशमनः स्तन्यशोधनो विण्मूत्रक्लेदमेदोवसापूयोपशोषणश्च; कषायकर्माणि–संग्राहको रोपणः स्तम्भनः शोधनो लेखनः शोषणः पीडनः क्लेदोपशोषणश्च ( चसू. २६.४३; सुसू. ४२.१० ) तेषामतियोगलक्षणानि–मधुरातियोगः–कासश्वासालसकवमथुवदनमाधुर्यस्वरोपघातकृमिगलगण्डानापादयति तथाऽर्बुदश्लीपदबस्तिगुदोपलेपाभिष्यन्दप्रभृतीञ्जनयति । अम्लातियोगः– दन्तहर्षनयनसंमीलनरोमसंवेजनकफविलयनशरीरशैथिल्यान्या-

पादयति, तथा क्षताभिहतदग्धदष्टभग्नशूनप्रच्युताव-मूत्रितविसर्पितच्छिन्नभिन्नविद्धोत्पिष्टादीनि पाच-यत्याग्नेयस्वभावात्परिदहति कण्ठमुरो हृदयं चेति। लवणातियोगः:- गात्रकण्डूकोठशोफवैवर्ण्यपुंस्त्वो-पघातेन्द्रियोपतापमुखाक्षिपाकरक्तपित्तवातशोणिता-म्लीकाप्रभृतीनापादयति रोगान् । कटुरसातियोगः:- भ्रममदगलताल्वोष्ठशोषदाहसंतापबलविघातकम्प-तोदभेदकृत् करचरणपार्श्वपृष्ठप्रभृतिषु च वातशूलाना-पादयति । तिक्तातियोगः:- गात्रमन्यास्तम्भाक्षेप-कार्दितशिरःशूलभ्रमतोदभेदच्छेदास्यवैरस्यान्यापा-दयति। कषायातियोगः:- हृत्पीडास्यशोषोदराध्मान-वाक्यग्रहमन्यास्तम्भगात्रस्फुरणचुमुचुमायनाकुञ्चना-क्षेपणप्रभृतीन् जनयति रोगान् ( चसू. २६.४३; सुसू. ४२.१० ) मधुरादिरसगणाः- द्राक्षामधूके-क्षुक्षौद्रगुडदुग्धादिर्मधुरो गणः; आमलकीमातुलुङ्गा-म्लीकाम्लवेतसदाडिमदधितक्रादिरम्लो गणः, सौवर्चलसामुद्रसैन्धवादिर्लवणो गणः, भूनिम्ब-निम्बकटुकीचन्दनहरिद्रादिः तिक्तो गणः, हिङ्गु-मरिचपंचकोलादिः कटुर्गणोः, हरीतकीखदिरो-दुम्बरमुक्ताप्रवालादिः कषायो गणः

( चवि. ८.१३९-१४४; अहसू. १०.२२-३२ )

षण्णां रसानां संयोगात् त्रिषष्टिः रसभेदाः भवन्ति ( सुसू. ४२.१२ )

जिव्हेने–जिभेने ज्याचे ज्ञान होते तो रस. त्याचे (१) गोड (२) आंबट (३) खारट (४) कडू (५) तिखट (६) तुरट असे सहा प्रकार आहेत. प्रत्येक पदार्थ जरी पाच महाभूतापासून उत्पन्न झाला असला तरी सुद्धा पाच महाभूतांपैकी ज्या दोहोंचे संयोगात उत्पत्तीचे प्रमाण अधिक असेल त्या प्रमाणे तो रस बनतो. व आधिक्य असणाऱ्या पंचमहाभूता-पासून त्याची उत्पत्ति झाली असे बोलले जाते. त्या प्रमाणे या सहा रसांची प्रमुख पंचमहाभूते पुढील प्रमाणे आहेत.

गोड रस=पृथ्वी आणि जल.

आंबट=तेज आणि पृथ्वी.

खारट=पाणी आणि तेज.

कडू=वायु आणि आकाश.

तिखट=तेज आणि वायु.

तुरट=वायु आणि पृथ्वी.

( १ ) मधुर रसाचे स्वरूपः- प्रत्येक रसाची ओळख जिभेने तो रस चाखून पाहिला म्हणजे होते. त्या प्रमाणे हा गोड रस जिभेने चाखला म्हणजे स्वादिष्ट लागतो. तोंडाला चिकटा येतो. सर्व शरीर आनंदित होते. इंद्रिये प्रसन्न होतात. मुंग्या इत्यादींना प्रिय असतो.

( २ ) आंबट रस— जिभेला लागताच मुखातून स्राव निघतात व तोंड स्वच्छ होते. अंगावर शहारे येतात. दात शिवशिवतात. डोळे आणि भिवया संकोच पावतात.

( ३ ) खारटरस— जिभेला लागताच मुखातून स्राव येतात, गाल आणि गळा यांचा दाह होतो.

( ४ ) कडू रस— तोंड स्वच्छ करतो. जिभेचे रस-ग्रहणकार्य होऊ देत नाही.

( ५ ) तिखट रस— जिभेच्या टोकाला झोंबतो, चिमचिम- होरपळल्यासारखी वेदना करतो. जीभ, तोंड, डोळे, नाक यांतून स्राव होऊ लागतो. गालांची आग होते.

( ६ ) तुरट रस— जीभ जड करतो, घसा व अन्नमार्ग आकुंचित करतो.

**रसांचे विपाक**— गोड व खारट यांचा विपाक गोड, आंबटाचा आंबट व तिखट, कडू व तुरट यांचा तिखट विपाक होते.

**त्यांची वीर्ये**— गोड, कडू व तुरट हे रस शीत वीर्य व आंबट, खारट आणि तिखट हे उष्ण वीर्याचे होत.

**त्यांचे गुण— स्निग्ध**– गोड, आंबट व खारट. **रूक्ष**– कडू, तिखट व तुरट. **गुरु**– गोड, खारट व तुरट. **लघु**– आंबट, तिखट व कडू.

**कर्मे— मधुररसकर्मे**– सात धातु ओज अंगा-वरील दूध वाढविणारा, डोळे केस व वर्ण यांना हितकर, बलकर, सांधणारा, रक्त शुद्ध करणारा; बालके, वृद्ध, उरःक्षताने क्षीण यांना हितकर; तहान, बेशुद्धि व दाहनाशक; पंचेन्द्रिये व मन यांना प्रसन्न करणारा; आणि कृमि करणारा आहे.

**आंबटरस कर्मे**–दोष व अग्निदीपक, दोष व अन्न पाचक, वात जिंकणारा, वात सरविणारा, पोटात दाह करणारा, बाहेर थंड, ओलावा निर्माण करतो व बहुधा हृदयाला हितकर होतो. **खारटरस कर्मे**— स्रोतसे शुद्ध करणारा, दोष पाचक, शारीर घटक विलग करणारा, ओलावा व ढिलेपणा करणारा,

उष्ण, सर्व मार्गांची शुद्धि करणारा, सर्व शरीरायवांना मृदु करणारा आणि सर्व रसांचा विरोधी आहे. **तिखटरस कर्मे**—अग्निदीपक, दोष अन्न पाचक रुचकर, दोषशोधक, स्थूलता, आळस, कफ, कृमि, विष, कुष्ठ व कण्डू प्रशामक, संधिबंधने तोडणारा, गळाठा निर्माण करणारा व अंगावरील दूध, शुक्र व मेदो धातु नष्ट करणारा आहे. **कडूरसकर्मे**— रुचि उत्पन्न करणारा, अग्निदीपक, दोषांचे छेदन व शोधन करणारा, खाज, चकंदळे, ज्वर, तहान, बेशुद्धि नाशक, अंगावरील दूध शुद्ध करणारा; विष्ठा-मूत्र-ओलावा-मेद-वसा-पू यांचे शोषण करणारा आहे. **तुरटरस कर्मे**—मळ बांधणारा, स्तंभक, शोधक, दोष व जलांश शोषक, दोष खरडून काढणारा, व्रण भरून आणणारा, दाब निर्माण करणारा आहे. **अतियोग लक्षणे—मधुरांची लक्षणे**— खोकला, श्वास, अलसक, वांती, तोंड गोड होणे, स्वराचा बिघाड, कृमि, गलगण्ड, आवाळू, हत्तीरोग, बस्तिरोग, गुदोपलेप, डोळे येणे इ० रोग मधुररसाच्या अतिसेवनाने होतात. अतिसेवनाने त्या रसाचा अति योग होतो. अम्लाच्या अतियोगाची **लक्षणे**-दात शिवशिवतात, डोळे मिटल्यासारखे होतात, रोमांच, कफ पातळ, व शरीर ढिले होते. उरःक्षताने क्षीण, जळालेला, विषारी दंशाचा, हाड मोडलेला, सूज आलेला, सांधे निखळलेला, मूत्रविषाने दुष्ट, विसर्प (धावरे) विकार असलेला हाड तुटलेला, फुटलेला, विंधलेला, हाडाचे चूर्ण झालेला यांचे ते ते अवयव पिकतात. त्यात पू होतो. कारण अम्लरस उष्ण आहे. कंठ, छाती व हृदयात दाह होतो. **खारट रसाचा अतियोग**- अवयवात खाज, चकंदळे, सूज, विवर्णता, पुरुषत्व कमी होणे, इंद्रियांचा दाह, तोंड, व डोळे येणे, रक्तपित्त, वातरक्त, अम्लपित्त इत्यादी रोग होतात. **तिखट रसाचा अतियोग**- चक्कर, माज, गळा, टाळू व ओठ सुकणे, दाह, अवयव तापणे, बलनाश, कंप, टोचणी, फूट उत्पन्न करतो. हात, पाय, फासळ्या, पाठ, इत्यादीमध्ये वाताचा शूल उत्पन्न करतो. **कडू रसाचा अतियोग**- गात्रे, मान आखडणे, आक्षेपक, तोंड वाकडे होणे, डोकेदुखी, चक्कर, टोचणी, फूट, छेदल्यासारखी पीडा, तोंड विरस हे विकार होतात. **तुरट रसाचा अतियोग**- हृदयात वेदना, तोंडाला कोरड, उदर, पोटफुगी, अडखळत बोलणे, मान ताठरणे, अवयवात स्फुरण चिमचिम होणे, अवयव आखडणे, आक्षेपक, इत्यादी रोग होतात. **मधुरादि गण**- मधुर गण- द्राक्ष, मोहाचे फूल, ऊस, मध, गूळ, दूध, इत्यादी. **आंबट गण**- आवळा, महाळुंग, चिंच, अम्लवेतस, डाळिंब, दही, ताक इत्यादी. **खारट गण**- पादेलोण, मीठ, सैंधव इत्यादी. **कडू गण**- काडेचिराईत, निंब, कुटकी, चंदन, हळद इत्यादी. **तिखट गण**- हिंग, मिरे, पंचकोलादी. **तुरट गण**- हिरडा, खैर, उंबर, मोती, प्रवाळ इत्यादी. सहा रसांच्या संयोगाने त्रेसष्ट रसांचे प्रकार होतात.

**( रसा )**-स्त्री., **वनस्पति० रास्ना** (ध. १.२७०) रास्ना. **सुरा, मद्यम्** ( ध. ६.२५५ ) मद्याचा प्रकार.

**-क्रिया**-स्त्री., **कल्प० घनीभूतरसस्य संज्ञा** ( चचि. २६.२०२ ) **माक्षिकादिना यद् द्रवीक्रियते द्रव्यं, सा रसक्रिया** ( अरु. ) **अवलेहः** ( हे अहसू. २२.१३ ) **फाणिताकृतिः, ' गृहीत्वा क्वाथकल्केन क्वाथं पूतं पुनः पुनः । क्वाथयेत्फाणिताकारमेषा प्रोक्ता रसक्रिया** (ड. सुउ. १०.७) **सम्यक्सिद्धलक्षणम् नातितनुर्नातिघनां शलाकोपलेपक्षमा अङ्गल्युपलेपक्षमा वा** (सुउ. १८.१०६ ) **सा च उपक्रमत्वेन शोधनरोपणभेदेन द्विधा** (सुचि. १.८ )

रसक्रिया. घट्ट रस. मध इत्यादींनी द्रव्ये पातळ करणे, कल्प व काढा गाळून त्याचा आटवून काकवीसारख केलेला पदार्थ. रसक्रिया योग्य असल्याचे **लक्षण**— फार पातळ नाही, फार घट्ट नाही, जी काडीला चिकटते किंवा अंगुळीला चिकटते ती रसक्रिया तयार झाली असे समजावे. शोधन आणि रोपण असे रसक्रियेचे दोन प्रकार आहेत.

**-क्रियाकल्पन**-न., **कल्प० रस क्रिया** (सुचि.१.७३) रसक्रिया.

**-क्षय**-पु., **लक्षण० रसधातुयुक्तप्रमाणहीनत्वं द्र० 'रसधातु'** ( सुसू. १५.९ ) रसधातूचा क्षय, रसधातु योग्य प्रमाणापेक्षा कमी होणे.

**-गन्ध**-न., **भैषज्य० बोलम्** ( रा. ६.११७ ) बोळ.

**-गन्धक**-पु., **खनिज० गन्धकः** (रा. १३.१६७) गंधक.

**–गर्भ**–न., खनिज० रसाञ्जनम् ( ध. ३.१५८ )
**भैषज्य० रसाञ्जनम्** ( ध. ३.१५८ ) रसांजन.
खनिज० हिङ्गुलम् ( रा. १३.४८ ) हिंगुळ.

**–घ्न**–पु., खनिज० टङ्कणः ( रा. ६.२८ ) टाकणखार.

**–चिन्तक**–वि., रसवेत्ता ( भिषक् ) (चसू. २६.२४)
वैद्य, रसज्ञ. षड्रसांचे शास्त्र जाणणारा.

**–ज**–वि., **रसात् जायते इति** ( चशा. ३.३ )
**रसदोषेण जातः** ( चसू. २८.२५ )
रसामुळे झालेला. रसदोषापासून झालेला.
**आहारद्रव्य० गुडः** (रा. १४.१९८) गूळ.

**–जभाव**–पु., **रसेभ्यः परिणतेभ्यः संजातः भावः तेन गर्भस्य शरीरोपचयो बलं वर्णःस्थितिर्हानिश्च** (सुशा. ३.३३)
रसधातूपासून निर्माण झालेला भाव. अवयव, समुदाय. गर्भाची शरीर पुष्टी बल वर्ण अस्तित्व व नाश हे रसजभाव होत.

**–जात**–न., खनिज० **रसाञ्जनम्** ( ध. ३.१५८ )
रसांजन.

**–तन्मात्र**–न., **पञ्चतन्मात्रेष्वेकम् तच्च रसतन्मात्रम् अनुद्भूतो रसः सूक्ष्मं जलम्** ( सुशा. १.४ )
रसतन्मात्र. सूक्ष्मजल. पाच तन्मात्रांपैकी एक. व्यक्त न झालेला रस.

**–दालिका**–स्त्री., वनस्पति० **इक्षुभेदः करङ्कशालिः** ( रा. १४.१८५ ) उसाचा एक प्रकार.

**–देश**–पु., **रसतो देशभेदः, स च जाङ्गलानूपसाधारणभेदात् त्रिधा** ( असंसू. १८.२८ )
रसाप्रमाणे देश प्रकार, जांगल, आनूप, साधारण देश.

**–दोष**–पु., **पारददोषः** ( र. ११.१७-२० )
पाऱ्याचा दोष.
**जलदोष, द्र० 'जल'** ( सुसू. ४५.११ )
पाऱ्याचा दोष.

**–दोषज**–वि., **दोषदूषितरसजाता विकाराः तेच अन्नाश्रद्धाऽरोचकोऽविपाकोऽङ्गमर्दो ज्वरो हृल्लासस्तृप्तिर्गौरवं हृद्रोगः, कार्श्यवैरस्याङ्गसादाकालवलीपलितदर्शनानि** ( सुसू. २४.९ ) **तन्द्रा तमः पाण्डुत्वं स्रोतोरोधः क्लैब्यम् अग्निनाशश्च** (चसू. २८.९-१०)
दोषांनी बिघडलेल्या रसधातूचे विकार–अन्नाची इच्छा नसणे. अरुचि, अपचन, आंग मोडून येणे, ज्वर, उमासे, तृप्ति, जडत्व, हृद्रोग, कृशता, वैरस्य, अंग गळणे, अकालवलीपलितदर्शन, झापड, अंधारी, पांडुत्व, स्रोतोरोध, नपुंसकत्व, अग्निनाश.

**–दोषसन्निपात**–पु., **रसानां दोषाणां चान्तःशरीरमेलकः** ( चवि. १.७ )
शरिरामधे रसांचा दोषांशी संपर्क येणे.

**–धातु**–पु., खनिज० **पारदः** (रा. १३.४२) पारा.
शारीरधातु० **सप्तधातुष्वेकः, अहरहर्गच्छतीत्यतो रसः** ( सुसू. १४.१३ ) **पाञ्चभौतिकस्य चतुर्विधस्य षड्रसस्य द्विविधवीर्यस्याष्टविधवीर्यस्य वाऽनेकगुणस्योपयुक्तस्याऽऽहारस्य सम्यक्परिणतस्य यस्तेजोभूतः सारः परमसूक्ष्मः, स रस इत्युच्यते। तस्य हृदयं स्थानं, स हृदयाच्चतुर्विंशतिधमनीरनुप्रविश्योर्ध्वगा दश दशाधोगामिन्यश्चतस्रश्च तिर्यग्गाः कृत्स्नं शरीरमहरहस्तर्पयति वर्धयति धारयति यापयति चादृष्टहेतुकेन कर्मणा। तस्य शरीरमनुसरतोऽनुमानाद्गतिः उपलक्षयितव्या क्षयवृद्धिवैकृतैः। स खलु द्रवानुसारी स्नेहनजीवनतर्पणधारणादिभिर्विशेषैः सौम्य इत्यवगम्यते** ( सुसू. १४.३ ) **स सर्वरसानां प्रीणयिता, तस्मात् पुरुषं रसजं विद्यात्। ततोऽन्नात्पानादाचाराच्च रसं प्रयत्नतो रक्षेत्** ( सुसू. १४.१२ ) **त्रीणि त्रीणि कलासहस्राणि पञ्चदश च कलाः स एकैकस्मिन् धातावतिष्ठते। एवं मासेन रसः शुक्रं, स्त्रीणां चार्तवं भवति** ( सुसू. १४.१४ ) **रसकर्माणि–तुष्टिः, प्रीणनं, रक्तपुष्टिश्च** ( सुसू. १५.५ ) **रसक्षयलक्षणानि–हृत्पीडाकम्पशून्यतास्तृष्णा**( सुसू.१५.९) **रौक्ष्यं, श्रमो, ग्लानिः, शब्दासहिष्णुता च** ( अहसू. ११.१७ ) **रसवृद्धिलक्षणानि–हृदयोत्क्लेदः प्रसेकश्च** ( सुसू. १५.१४) **गौरवालस्यश्वासकासातिनिद्रताः श्वैत्यशैत्यश्लथाङ्गत्वमग्निसदनम्** ( अहसू. ११.७ ) **रसनिमित्तमेव स्थौल्यं कार्श्यं च** ( सुसू. १५.३२ )
शरिराचा घटक धातु. सात धातूंपैकी एक. जो दररोज जातो, चालू असतो तो रस. पांचभौतिक, खाद्य पेयादि ४ प्रकारच्या, षड्रसयुक्त, द्विविध किंवा अष्टविध वीर्य संपन्न, अनेक गुणयुक्त अशा घेतलेल्या आहाराचे चांगले पचन झाल्यानंतर जो प्रसादरूप अतिसूक्ष्म असा सारभाग तयार होतो त्याला रस असे म्हणतात. हृदय हे त्याचे स्थान आहे. तो

हृदयाकडून धमन्यांमध्ये प्रवेश करतो. दहा ऊर्ध्वग दहा अधोग, आणि चार तिर्यग् गमन करणाऱ्या अशा त्या २४ धमन्या रात्रंदिवस सर्व शरिराचे पोषण, संवर्धन, धारण व सावरून धरणे ह्या क्रिया नैसर्गिक रीतीने करीत असतात. शरिरात संचार करणाऱ्या रसाची गती, क्षय आणि वृद्धि अनुमानाने जाणावी. तो द्रवधातूबरोबर जातो. व स्नेहन तृप्ति, जीवन आणि धारण इ. विशेष कर्मांनी सौम्य असल्याचा प्रत्यय येतो. तो सर्व रसांचा पोषक असल्याने पुरुषाला **रसज** असे म्हणतात. म्हणून खाद्य पेय आणि वर्तन यांच्या द्वारे रसाचे रक्षण करावे. एका एका धातूमध्ये ३०१५ कला म्हणजे ५ अहोरात्र तो असतो. अन्नापासून रसधातु मात्र एक दिवसातच तयार होतो. या प्रमाणे एक महिन्या-नंतर रस हा पुरुषाचे शुक्र व स्त्रियांचेही शुक्र ( आर्तव ) बनतो.

**रसाची कर्मे**-समाधान, संतोष व रक्ताचे पोषण ही होत.

**रसक्षयलक्षणे**-हृदयात पीडा, कंप, आमाशयात पोकळ वाटणे, किंवा मनाला रिकामे वाटणे, रूक्षता, थकवा, ग्लानी व शब्द सहन न होणे ( याबरोबरच प्रकाश, गंध, रस, स्पर्श सहन न होणे ही सुद्धा लक्षणे संभवतात. म्हणून शब्द सहन न होणे हे चिन्ह उपलक्षणात्मक होय. )

**रसवृद्धीची लक्षणे**-उमासे येणे, तोंडाला पाणी सुटणे, जडत्व, आळस, अति झोप, अंग ढिले असणे, अग्निमांद्य, शरीर पांढरे व थंड असणे, श्वास आणि खोकला.

शरिराची स्थूलता व कृशता रसावरच अवलंबून आहे.

**–नाथ**–पु., **खनिज० पारदः** ( रा. १३.४० ) पारा.

**–नाभ**–न., **खनिज० रसाञ्जनम्** ( रा. १३.२२२ ) रसांजन.

**–निगम**–पु., **रसग्रन्थ०** ( र. ८.९९ ) रसशास्त्रासंबंधी ग्रंथ.

**–पङ्क**–पु., **पारदयोग० गन्धकादिधातुभिः सह मेलनेन द्रवेण मर्दिता पारदस्य कज्जली** ( र. ८.६ ) रसपङ्क नावाचे सिद्धौषध, पाऱ्याची कज्जली. गंधकादी पाऱ्यामध्ये घालून द्रवद्रव्यासह खलून केलेली कज्जली.

**–पत्रिका**–स्त्री., **वनस्पति० पालक्या** ( र. १०.८१ ) पालक.

**चुक्रम्** ( र. १०.८१ ) चुका.

**कपित्थ** ( र. १०.८१ ) कवठ.

**–पाकज**–पु., **आहारद्रव्य० गुडः** (ध. ४.१२८) गूळ.

**–पुष्प**–पु., **वनस्पति० जलदः** ( ध. ५.४९ ) पाण्यातील मोहाच्या वृक्षाची जात.

**–प्रदोषज**–वि., **रसप्रदोषेण जनितः रसदोषजः** ( चसू. २८.११ ) रसाच्या दुष्टीपासून उत्पन्न झालेला. तो रसप्रदोषज.

**–प्रभाव**–पु., **रसस्य कर्मविशेषकारित्वम्** ( चवि. १.१२ ) रसांचे विशिष्टकार्यकारित्व.

**–प्रलेपिन्**–वि., **रसप्रलेपनरूपतया निर्वृत्तं रसप्रलेह इति यावत्** ( चक्र. चचि. २४.१२८ ) साधारण लेप होण्याइतपत घट्ट स्वरूपात तयार केलेले (मांस).

**–प्रवाहिन्**–वि., **रसवहम् स्रोतः** ( सुउ. ३९.१७ ) रसवह स्रोतस.

**–प्रसाद**–पु., **रसस्य सारः, ' रसस्य प्रसन्नो भागः '** ( सुनि. १०.१८) रसाचा उत्कृष्ट भाग.

**–फल**–पु., **वनस्पति० नारिकेलः** ( ध. ५.७४ ) नारळ.

**–बोधन**–न., **रसस्य रसनया ज्ञानम्** ( अहृसू. १२.१७ ) जिभेने रसाचे घेतलेले ज्ञान.

**–भस्म**–पु., **पारदयोग० पारदभस्म** ( र. ३०.११-१३ ) पारदभस्म.

**–भावित**–वि., **मांसरसभावितम्** (सुउ. १७.१३-१४) मांसरसाची भावना दिलेले.

**–भेद**–पु., **रसस्य भेदो नाम प्रकारः** ( सुउ. ६३.३ ) रसाचा प्रकार.

**–भेदविकल्प**–पु., **अध्यायसंज्ञा०** ( सुउ. ६३.१ ) या नावाचा अध्याय.

एक दोन तीन इत्यादी रसाच्या गटांनी होणारे रसाचे प्रकार यात दिले आहेत.

**–भैरव**–पु., **पारदस्य शिवलिङ्गम्** (र. ७.३) पारदाचे शिवलिंग.

**–मण्डप**–न., **रसशालासमीपस्थं ध्वजच्छत्रवितानाढ्यं पारदनिर्मितशिवलिङ्गस्य स्थानम्** (र. ६.१३) रसमंडप. रसशाळेजवळ ध्वज, छत्र, वगरेंनी

सुशोभित केलेले स्थान–ज्याठिकाणी पारदलिंग ठेवले आहे.

**–मूर्च्छित**–वि., **रससंयुतः** (सुउ. ४२.१३१–१३२) रसाबरोबर संमिश्रण झालेले.

**–यवागू**–स्त्री., **मांसरसयवागुः दन्तहर्षविकारे उपयुक्ता** ( सुचि. २२.३५ ) मांसरसात केलेली दाट पेज. दंतहर्ष नावाच्या दंतरोगात उपयोगी.

**–योनित्व**–न., **द्रवसंबन्धादेवाम्लादीनामुपपन्नम्** (चसि.१०.१४) जल ह्या महाभूताच्या द्रवत्वामुळे अम्लादिरसाचे उत्पत्तिकारण सिध्द होते.

**–रञ्जन**–न., **रसस्य रञ्जनम्** ( अहसू. १२.१३ ) रसाला ( पाऱ्याला ) रंग आणणारे.

**–रत्नसमुच्चय**–पु., **रसग्रंथ० सिंहगुप्तसूनुना वाग्भटेन विरचितो रसोपरसधातूपधातुविषयको ग्रन्थः, अयमेव सिंहगुप्तसूनुर्वाग्भटअष्टाङ्गहृदयकाराद् वाग्भटात् अर्वाकालभवः इति ज्ञेयम्** (र.१.८) सिंहगुप्तांचा मुलगा वाग्भट याने रचलेला तयार केलेल्या रस–उपरस–धातु–उपधातु इत्यादी विषयांच्या ग्रंथाचे नाव. हा वाग्भट अष्टांगहृदयकार वाग्भटापेक्षा अलीकडचा आहे.

**–राज**–पु., **खनिज० पारदः** (रा. १३.४०) पारा.

**–लिङ्ग**–न., **पारदशिवलिङ्गम्** (र. १.२४) पाऱ्याचे शिवलिंग.

**–लोह**–पु., न., **खनिज० पारदः** ( ध. ६.३७ ) पारा.

**–वर्त्मन्**–न., **आहाररसस्य संचारमार्गः, मार्गेणैतेन धातुपोषणं भवति** ( सुउ. ४१.९ ) आहार रसाचा शरीर पोषणासाठी फिरण्याचा मार्ग. या मार्गद्वाराच धातूंचे पोषण होते.

**–वह**–वि., **रसवहं ( स्रोतः )** ( चनि. १.२० ) रसवह स्रोतस.

**(–वहा)**–स्त्री., **रसवहस्रोतः** ( असंशा. ४ ) रसवह स्रोतस.

**–वहस्रोतस्**–न., **शारीर० स्रोतो० रसधातोः प्रभवस्य वहनस्य च स्थानम्** (चवि. ५.७) **रसवहानि बहूनि स्रोतांसि चरकमते, सुश्रुतमते तु रसवहे द्वे स्रोतसी** ( सुशा. ९.१२ ) **रसवहानां स्रोतसां हृदयं मूलं दश च धमन्यः** ( चवि. ५.८ ) **रसवहस्रोतोद्वयस्य मूलं हृदयं रसवाहिन्यश्च धमन्यः** ( सुशा. ९.१२ ) **गुरुशीतमतिस्निग्धमतिमात्रं समश्नतां रसवहानि स्रोतांसि दुष्यन्ति, तथैव चिन्त्यानामतिचिन्तनादपि तद्दुष्टिः संभवति** ( चवि. ५.१३ ) **रसधातुप्रदोषजा रोगा एव रसवहस्रोतसां रोगा विज्ञेयाः** ( चसू. २८.९-११ ) **रसवहस्रोतोविद्धस्य लक्षणानि प्राणवहस्रोतोविद्धवद्भवन्ति, तानि तु क्रोशनविनमनमोहनभ्रमणवेपनानि मरणं वेति** ( सुशा. ९.१२ ) शरिरामध्ये रसधातूच्या उत्पत्तीचे व वहनाचे स्थान. चरकमताने त्यांची संख्या अनेक आहे. सुश्रुतमताप्रमाणे मात्र दोनच रसवाही स्रोतसे आहेत. रसवाही स्रोतसांचे मूळ हृदय व दहा शिरा आहेत. रसवह दोन स्रोतसांचेही मूळ हृदय व रसवाही धमन्या आहे. गुरु, शीत, अतिस्निग्ध, प्रमाणाने अधिक असे खाण्याने रसवह स्रोतसे बिघडतात. तसेच अतीशय चिंतनानेही त्यांचा बिघाड होतो. रसधातु प्रदोषाचे जे विकार आहेत तेच रसवह स्रोतसांचेही विकार आहेत. रसवह स्रोतसावर आघात झाला तर आक्रोश, वाकणे, बेसावधता येणे, चक्कर येणे, कंप सुटणे, मरणसुद्धा येते.

**–वाहिन्**–वि., **शारीर० रसवहम्** ( **स्रोतः** ) ( असंशा. ६.४३ ) रसवह स्रोतस.

**–वाहिनी**–स्त्री., **शारीर० गर्भपोषणार्थ मातृहृदयगर्भनाभिप्रतिबद्धा नाडी** (चशा.४.१५) गर्भपोषणासाठी मातेच्या हृदयापासून गर्भाच्या हृदयापर्यंत जोडलेली नाडी, शीर.

**–वाहिस्रोतस्**–न., **शारीर० रसवहस्रोतः** ( चवि. ५.१३ ) रसवह स्रोतस.

**–वाहि–धमनी**–स्त्री., **रसवहस्रोतःसंबन्धिनी धमनी** ( सुशा. ९.१२ ) **अत्र वृत्तौ पुंवद्भाव इति रसवाहिनीशब्दस्थाने रसवाहिपदनिवेशो युक्त एव ।** रसवह स्रोतसाशी संबंध असणारी धमनी.

**–विकल्पज्ञ**–वि., **रसविकल्पं जानानः** (चसू. २६.२७) रसाचे स्वरूपभेद समजणारा वैद्य.

**–विमान**–न., **अध्यायसंज्ञा०** ( चवि. १.१ ) या नावाचा अध्याय. यात रसाची माहिती आहे.

**–विरुद्ध**–वि., **रसतो विरुद्धम्** ( सुसू. २०.१६ ) **द्र० ' विरुद्ध '** संयोगानंतर रस ह्या गुणामुळे एका रसाविरुद्ध असलेला दुसरा रस.

**–विशारद**–वि., **रसवीर्यविपाकविशारदः, विषविशारदः** ( सुसू. ३४.७ )

रसवीर्य विपाक जाणणारा–वैद्य. विषविषयक संपूर्ण ज्ञान असणारा.

**–विशेष**–पु., **रसनेन्द्रियविज्ञेयःप्रमेहादिषु माक्षिका–पिपीलिकाद्युपसर्पणेनानुमेयो मधुरादिरसविशेषः** ( सुसू. १०.५ )
गोड इ० रसवैशिष्ट्य हा जिभेने समजावयाचा विषय. प्रमेहादिरोगात मूत्र व शरिरातील मधुरादी रसांचे अनुमान माशा, मुंग्या इ० शरिरावर अधिक येणे यावरून करता येते.

**–विशेषविज्ञानीय**–वि., **रसविशेषविज्ञानमधिकृत्य कृतः (अध्यायसंज्ञा०)** ( सुसू. ४२.१ )
या नावाचा अध्याय. रसांच्या विशेषांचे ज्ञान यात आहे.

**–वेदिनी**–स्त्री., शा० **सिराविशेषः, जिह्वायां वर्तमाना सिरा** ( असंशा. ६.१७ )
जिभेत असणारी (रस समजणारी) शीर.

**–वैद्यक**–न., **रसशास्त्रम्** ( र. ७.२८ ) रसशास्त्र.

**–व्यापद्**–स्त्री., **मधुरादिरसजन्यविकारः** (सुसू. ६.३)
गोड इ० सहा रसांमुळे होणारे विकार.

**–शुक्त**–न., **आसुत० इक्षुरसादिकृतं शुक्तम्** ( सुसू. ४५.२१२ )
उसाचा रस किंवा इतर द्रव्यापासून केलेला शिरका.

**–शेषाजीर्ण**–न., रोग० **अजीर्णभेदः** ( अहसू. ८.२९ )
**तल्लक्षणम्–आहारस्यैव पक्वस्योर्वरितो रसो रसशेषस्तद्भवमजीर्णम्, तत्रोद्गारशुद्धावपि भक्त-काङ्क्षा न जायते, हृद्गुरुता लालास्रावश्च भवति** ( सुसू. ४६.४९९-५०३ )
अजीर्णाचा एक भेद. पचलेल्या आहाराचा जरूरीपेक्षा अधिक असलेल्या–शिल्लक असलेल्या रसापासून झालेले अजीर्ण. **चिन्हे**– ढेकर शुद्ध असूनही जेवणाची इच्छा न होणे, हृदय जड व लाळ गळणे.

**–संपद्**–स्त्री., **रससंपत्तिः** ( सुसू. ६.३ )
रससंपत्, रसाच्या गुणाचे आधिक्य आणि श्रेष्ठत्व.

**–संयोग**–वि., **रसे स्नेहार्थोक्तरसे उचितः संयोगो येषां, ते रससंयोगाः** ( चक्र. चसू. १३.८४ )
स्नेह तयार करण्यासाठी सांगितलेल्या योग्य अशा रसांचा संयोग.

**–संयोगसंग्रह**–पु., **रससंयोगानां संग्रहणम्** ( चसू. १३.८४ )
स्नेह तयार करण्यासाठी सांगितलेल्या योग्य अशा अनेक रस संयोगांचा संग्रह.

**–संवहन**–न., **रसप्रेरणम्** ( सुनि. १.१७-१८ )
द्र० ' रसधातु ' रसवहन.

**–संसर्ग**–पु., **षण्णां मधुरादिरसानां परस्परेण मेलनम्** ( सुउ. १.७ )
मधुरादि सहा रसाचे परस्पर एकत्रीकरण होणे.

**–सात्म्य**–न., **सेवितः सन् यो रसः सुखकारणं आरोग्यकारणं भवति, तत् रससात्म्यम्** ( सुसू. ३५.३९-४० )
जो रस घेतला असता शरिराला स्वास्थ्य लाभते ते रसाचे सात्म्य.

**–स्थान**–न., **रसस्याऽश्रयो हृदयम्** ( सुशा. ९.७ )
रसाचे आश्रयस्थान, हृदय.

**–स्थानाभिपूरण**–न., **हृदयाभिपूरणम्, आमपक्वाशयेऽधोनाभेरेवैवमन्नरसो वर्तुलीकृतो रसस्थानस्य पूरणं ततश्चोर्ध्वगाभिस्तिर्यग्गाभिश्च धमनीभिः तत्र तत्रोपनीयते इति सकलशरीरतर्पणमधोगतानामेव कर्म, रसस्थानं च हृदयं तत्पूरणं च** (ड.सुशा.९.७)
आमाशय ते पक्वाशयापर्यंत पचून नाभीच्या खालच्या भागातून तो वर्तुलाकार मार्गाने वर हृदयात अधोग धमन्यांनी आणला जातो. त्या त्याचे पूरण करतात. तेथून वर जाणाऱ्या व तिरक्या जाणाऱ्या धमन्यांनी सर्व शरिरातील त्या त्या अवयवात नेला जातो.

**–हारिणी**–वि., **रसवाहिनी ( धमनी )** (असंशा. २.१७) रसवाही धमनी.

**रसक**–पु., खनिज० **खर्परः** (र.२.१५४) **तद्भेदाः–सदलो दर्दुरः निर्दलः कारवेल्लश्च। तद्गुणाः–लोहपारदरञ्जनः पित्तकफघ्नः सर्वमेहनेत्ररोगक्षयघ्नः** (धपरि.६.२५)
कलखापरी; त्याचे भेद–दळे असलेली, दर्दुर, निर्दल, कारवेल्लक. **गुण**—पारदाला रंग आणणे, पित्तकफ-नाशक, सर्व मेह–नेत्र–रोग नाशक, क्षयनाशक.
**अमृतम्** (र. १२.१२४) विष ( बचनाग )

**रसन**–न., ज्ञानेन्द्रिय० ( चशा. ७.७ )
**रसनेन्द्रियम्, रसना** (चशा. ४.१२; चशा. ७.७)
जिव्हा, जिव्हाश्रित असणारे रसनेंद्रिय.
**आस्वादनं भक्षणं वा; रसीभवनं द्रवीभवनं वा** ( र. १.७५ )
आस्वाद घेणे, खाणे, रस होणे, पातळ होणे.

**( रसना )**–स्त्री., **रसनेन्द्रियम्** ( चसू. १.६४ )
जिव्हा. रसनेंद्रिय.

वनस्पति० रास्ना ( ध. १.२७० ) रास्ना.

**रसनेन्द्रिय**–न., इंद्रिय० रसना, जिह्वा ( सुशा. १.१९) रसनेंद्रिय, जिव्हा.

**रसयितृ**–वि., रसज्ञापकः, आस्वादयिता ( सुशा. ३.४ ) रस समजणारा, आस्वाद घेणारा.

**रसाग्रज**–न., खनिज० रसाञ्जनम् ( रा. १३.२२१ ) रसांजन.

**रसाग्र्य**–न., खनिज० रसाञ्जनम् ( ध. ३.१५८ ) रसांजन.

**रसाङ्कुश**–पु., रसरत्नसमुच्चयकर्तुः प्राक्तनस्तन्त्रकर्ता, यस्य तन्त्रमालोच्य सिंहगुप्तसूनुना वाग्भटेन स्वीयः संग्रहः कृतः ( र. १.५ )
सिंहगुप्त पुत्र वाग्भटाने आपल्या पूर्वींच्या ज्या ग्रंथावरून आपला संग्रहग्रंथ रसरत्नसमुच्चय केला त्या ग्रंथाच्या कर्त्याचे नाव.
वनस्पति० नन्दिका, पत्राकारा, शम्बरी महौषधी–इयं पारदस्य भावनस्वेदादौ उपयुक्ता (र. ११.५४-५८) रसांकुशा, शंबरी इत्यादी नावाची महौषधी. ही पाऱ्याला भावना, स्वेदन इत्यादीमध्ये उपयुक्त.
खनिज० टङ्कणक्षारः ( र. ११.५४ )
टाकणखार.

( **रसाङ्कुशी** )–स्त्री., मंत्रविद्या० ॐ कामराजशक्तिबीज-रसाङ्कुशायै आज्ञेया विद्यां रसाङ्कुशीमिति ( र.६.२३ ) मंत्रविद्या. वरील मंत्र त्या विद्येत आहे.

**रसाङ्गक**–पु., वनस्पति० श्रीवेष्टकः ( रा. १२.१९२ ) ऊद, धूप.

**रसाज्ञत्व**–न., लक्षण० जिह्वा रसं न चेतयत इत्यर्थः (अरु.अहृसू. ७.२१) रसाची जिभेला चव न लागणे.

**रसाञ्जन**–न., दारुहरिद्रा क्वाथकृतमञ्जनम् (चचि. ७.६१) दार्वीक्वाथसमं क्षीरं पादावशेषघनद्रव्यम् ( सुसू. १४.३६ ) तस्य शोधनम्, सूर्यावर्तादिगण-भावनया रसाञ्जनं दोषरहितं भवति (र. ३.११८) तद्गुणाः–तिक्तं, कटु, शीतमुष्णं, वर्ण्यं, चक्षुष्यं, हृत्प्रसादनं पित्तकफघ्नं, रक्तपित्तहिध्माश्वास-मुखरोगविषच्छर्दिनाशनम् ( ध. ३.१५८ ) नेत्ररोगे वर्त्यञ्जनार्थमुपदिष्टम् (सुउ. ११.९) सिरा-व्यधनानन्तरमतिप्रवृत्ते रक्ते तत्स्तम्भनार्थमुपयुज्यते माषायवगोधूमचूर्णैः शनैः शनैर्व्रणमुखमवचूर्ण्या-ङ्गुल्यग्रेणावपीडयेत् (सुसू. १४.३६) तद्द्वि-विधम् स्रोतोऽञ्जनं कृष्णपाषाणाकृति धातुद्रव्यम्, अन्ये दारुहरिद्राक्वाथेन कृत्रिमं पीतलोहितम्, आ. को, म. १४९ अत्र सौवीराञ्जनसाहचर्याध्दातुद्रव्यमेव ( ड. सुसू. ३८.४१-४२)
दारुहळदीचा शिरा. रसांजन. दारुहळदीचाकाढा समप्रमाणात दूध घालून कढवावा. एक चतुर्थांश शिल्लक राहिल्यावर तो रसांजन म्हणून घ्यावा. रसांजनाला सूर्यावर्तादिगणाच्या भावना दिल्या म्हणजे रसांजन दोषरहित होते. रसांजन **गुण**—तिखट, कडू, शीत, उष्ण, वर्ण व डोळे यांना हितकर, हृदयाला प्रसन्नता आणणारे, पित्तकफनाशक, रक्त–पित्त–हिध्मा (उचकी)–श्वास–मुखरोग–विष–ओकारी नाशक आहे. नेत्ररोगामध्ये याची वर्ति अंजनाकरिता उपयोगी. सिराव्यध विधी नंतर जर अधिक रक्तस्राव झाला तर रसांजन तेथे स्तंभनाकरिता उपयुक्त होते. उडीद, जव, गहू यांचे पीठ व रसांजन बोटाच्या टोकाने व्रणाच्या तोंडावर हळूहळू दाबावे. दुसऱ्या प्रकारचे रसांजन–काळ्या दगडासारखे धातुद्रव्य आहे. दारूहळदीच्या काढयाने केलेले पिवळे, तांबूस ते कृत्रिम रसांजन असे काही म्हणतात. येथे सुरम्याच्या साह्याने केलेले धातुद्रव्यच रसांजन म्हटले आहे.

**रसाढ्य**–पु., वनस्पति० आम्रातकः ( ध. ५.१२ ) आंबाडा.

(**रसाढ्या**)–स्त्री., वनस्पति० रास्ना (रा.३.३९७) रास्ना.

**रसात्यय**–पु. अत्ययो नाशः, तेन रसनाशः ( असंसू. १२.३९ ) रसाचा नाश.

**रसाधिक**–पु., खनिज० टङ्कणक्षारः ( रा. ६.२८ ) टांकणखार.

**रसान्तर**–न., अन्यो रसः ( अहृसू. ९.२० ) दुसरा रस.

**रसाभितर्पण**–न., रसधातोः पोषणम् ( सुशा. ९.९ ) रसधातूचे पोषण.

**रसाभिधा**–स्त्री., वनस्पति० पिण्डखर्जूरिका ( ध. ५.५५ ) पेण्डखजूर.

**रसाम्ल**–पु., वनस्पति० अम्लवेतसः ( ध. २.९६ ) आम्लवेतस.
न., आसुत० शुक्तम् ( अहृसू. ५.७६ )
उसाच्या रसाचा शिरका.
वनस्पति० वृक्षाम्लम् ( रा. ६.१४४ )
अंबाडा. कोकम ( अमसूळ ) चिंच.

( **रसाम्ला** )–स्त्री., वनस्पति० पलाशी ( रापरि. ३.५० )
पलाशी. आंबट व लांब पानाची लांब वेल.

**रसायन**-न., आयुर्वेदाङ्ग० ( चसू. ३०.२८ ) जराव्याधिनाशकमौषधम्, "स्वस्थस्यौजस्करं यत्तु तद्वृष्यं तद्रसायनम्" ( चवि. ३.१४ ) शस्तानां रसादीनां सप्तधातूनां लाभोपायः ( चचि. १.(१)-८ ) तद्गुणाः–दीर्घमायुः स्मृतिर्मेधाऽऽरोग्यं, तरुणं वयः प्रभावर्णस्वरौदार्यं, परं देहेन्द्रियबलं वाक्सिद्धिः प्रणतिः कान्तिश्च ( चचि. १.८ ) कानिचिदुदाहरणानि–वर्धमानपिप्पलीरसायनम्–प्रथमदिने दशपिप्पलीः सदुग्धं सेवेत। अनन्तरं प्रतिदिनं दशदशपिप्पलीनां क्रमेण वर्धनाद् दशदिनं दुग्धेन सह सेवेत। तथैव क्रमशः प्रतिदिनं दशदशपिप्पलीरपनयेत्। एवमेकोनविंशतितमे दिने सहस्रपिप्पल्यो भवन्ति। एतद्रसायनं परमायुष्यं वयसः स्थापनं बृंहणं स्वर्यं, मेध्यं, प्लीहोदरविनाशनं च भवति (चचि.१.(३)३६-४०) लशुनोऽपि रसायनविधिनोपयुज्यते। शीतवातहिमदग्धतनूनां स्तब्धभग्नकुटिलव्यथितास्थ्नां पवनोपहतानां च लशुनः परमं भेषजम्। लशुनं शीते शीलयेत्। कफोल्बणो वसन्तेऽपि तथा वातार्तो वर्षास्वपि स्निग्धशुद्धतनुः शीतमधुरोपस्कृताशयो लशुनं सेवेत ( अहृउ. ३९.११३-१४ ) भल्लातकमामलकादिभिरुपयुक्तं प्रशस्तशरीरकरणं तथा मेध्यमायुष्करं च सर्वकफरोगेषु तथा विबन्धेषु च प्रयुञ्जीत। तद् भल्लातकरसायनं शीघ्रमग्निबलप्रदम् ( अहृउ. ३९.८०-८२ ) गोक्षुरामलकगुडूचीनां चूर्णं सघृतं मधुभागमिश्रं लिह्यात्। तेन दीर्घायुः केशानां कृष्णत्वं च भवति (अहृउ. ३९.१५९) तथा शीलाजतुरसायनम्, तद्विधिश्च–शिलाजतु कोष्णे वातहरादिक्वाथे प्रक्षिप्य रौद्रे शोषयेत् ततः क्वाथाद् उद्धृतं पुनरपि तद्रसे क्वाथे प्रक्षिपेत् अनेन विधानेन लोहैः सह चूर्णीकृतं शिलाजतु पयसा पिबेत्। पलमर्धपलं कर्षो वेति अस्य त्रिधा मात्रा। अस्य प्रयोगः सप्तसप्ताहाभिव्यापकः परो भवति, त्रिसप्ताहात्मको मध्यः, एकसप्तकोऽवरो भवति। अस्य सेवनेन दीर्घमायुर्लभते। जराव्याधिप्रशमनं भवति, परं देहदार्ढ्यं जायते। नरः मेधास्मृतियुक्तो भवति। शिलाजतुप्रयोगेषु विदाहिगुरुपदार्थान् सर्वकालं वर्जयेत्, विशेषतः कुलत्थान् परिवर्जयेत्। ते परमश्मनो भेदनाः सन्ति। अतस्तेषामत्यन्तविरुद्धत्वात् तान् परिवर्जयेत्। पयांसि, तक्राणि रसः यूषास्तोयं समूत्रा विविधाः कषायाः गिरिजस्यालोडनार्थं शस्ताः। भुवि साध्यरूप एकोऽपि रोगो नास्ति, यः शिलाह्वयेन न सिद्ध्येत् तस्य विधिभिः कालयोगैः च कृतः प्रयोगो विपुलामूर्जां ददाति ( चचि. १ ( ३ ) ५१-५४; ६२-६५ )

रसायन आयुर्वेदाचे एक अंग. स्वस्थ मनुष्याच्या धातु व मन यांची तुष्टी पुष्टी उत्साह वाढवणारे द्रव्य रसायन होय; ते शुक्र धातूला ही वाढवते. विशुद्धतर धातूंचा लाभ देणारा उपाय तो रसायन होय.

**याचे गुण**— दीर्घायुष्य प्राप्त होते, स्मृति, मेधा, आरोग्य, कायम तारुण्य, प्रभा, वर्ण, स्वर, औदार्य, ही उत्कृष्ट राहून शरिराचे आणि इंद्रियांचे बल उत्कृष्ट होते, वाणीला सिद्धी प्राप्त होते, नम्रता येते, शरीर तेजःपुंज होते. रसायनाची काही उदाहरणे ( नमुने ) **वर्धमानपिंपळी**— रसायनाची सुरुवात पहिल्या दिवशी १० पिंपळ्या ध्याव्यात, दुधात शिजवून त्या ध्याव्यात. याप्रमाणे दररोज दहा दहा पिंपळ्या वाढवीत दहा दिवस पर्यंत ध्याव्यात. त्याप्रमाणे अकराव्या दिवसापासून दररोज दहा दहा पिंपळ्या कमी करीत येऊन एकोणविसावे दिवसापर्यंत एक हजार पिंपळ्यांचे सेवन होते. हे रसायन आयुष्याला हितकारक, तारुण्य प्राप्त करणारे, पौष्टिक, स्वर व मेधा चांगली करणारे, प्लीहोदरनाशक आहे. या प्रमाणेच लसूण सुद्धा रसायनविधीने ध्यावा. शैत्यवात इत्यादींनी झालेल्या विकाराने शरीर जर व्यथित असेल, हाडे ताठरली फुटली वाकडी झाली तर अशा अवस्थेत तसेच वातरोगाने पीडित असेल तर लसूण हे त्यावर दिव्य औषध आहे. थंडित लसुणाचा उपयोग विशेष करावा. कफाधिक्य असताना वसंत ऋतूत सुद्धा व वाताने पीडीत असता वर्षाऋतूत लसूण रसायन म्हणून ध्यावे. त्या प्रमाणेच बिब्वा, आमलक ( आवळा ) इत्यादी द्रव्ये रसायनाकरिता ध्यावयाच्या द्रव्यामध्ये श्रेष्ठ आहेत. कफनाशक, बुद्धि व आयुष्यवर्धक म्हणून व अवष्टंभावर भल्लातकरसायन ध्यावे. हे जठराग्नीचे बल त्वरित वाढवते. गोखरू, आवळा, आणि गुळवेल यांचे चूर्ण मध आणि तुपांतून चाटावे. त्यानी दीर्घायुष्य प्राप्त होते. केसाना काळेपणा येतो. तसेच शिलाजित रसायन आहे. **शिलाजित रसायनाचा विधी** –वातहर द्रव्याचे कोमट काढ्यांत शिलाजीत घालावे व ते उकळवून कोरडे

करावे. त्या मध्ये परत परत काढा घालून लोहचूर्णासह उकळावे व नंतर त्याचे चूर्ण झाले म्हणजे ते दुधाशी प्रत्येक वेळी चार चार तोळे किंवा दोन दोन तोळे किंवा एक एक तोळा अशा तीन तऱ्हेच्या मात्रेने घ्यावे. सात आठवडे घेणे उत्तम, तीन आठवडे मध्यम, एक आठवडा हे कनिष्ट स्वरूपाचे घेणे होय. रसायनाने दीर्घायुष्य लाभते. म्हातारपण व व्याधी यांचा नाश होतो. शरीर बळकट बनते. शरीर-मेधा-स्मृतियुक्त होते. शिलाजीत रसायन चालू असताना विदाही गुरु पदार्थ सर्वकाळ वर्ज करावेत. विशेषतः कुळीथ तर वर्जच करावेत. कारण ते ( कुळीथ ) अत्यंत भेदक आहेत. म्हणून ते घेऊच नयेत. ते विरुद्ध आहेत. दूध, ताक, मांसरस, यूष, निरनिराळ्या तऱ्हेची मूत्रे घातलेले काढे, हे शिलाजीतरसायन घेण्याचे वेळी अनुपान म्हणून घ्यावेत. भूतलावर एकही रोग नाही की जो शिलाजिताने बरा होणार नाही. मात्र त्याची योग्य तऱ्हेने योजना झाली पाहिजे, असा हा सफलप्रयोग आहे. हा अति उत्साहवर्धक आहे.

**(रसायनी)**–स्त्री., **रसवाहिनी, रसस्रोतः** (चचि.२०.१०) रसवहस्रोतस.
**धमनी०** ( सुचि. १२.८ ) धमनी रस वाहणारी.
**वनस्पति० गोरक्षदुग्धी** ( रापरि. ५.५३ ) अनेक पाने असणारी, तांबडे दूध निघणारी वनस्पती.
**काकमाची** ( ध. ४.२१ ) कावळी.
**जटामांसी** ( रा. १२.१२९ ) जटामांसी.
**गुडूची** ( ध. १.४ ) गुळवेल.

**रसायनतन्त्र**–न., **आयुर्वेदस्याष्टाङ्गेष्वेकम्** ( सुसू. १.७ ) **वयःस्थापनमायुर्मेधाबलकरं रोगापहरणसमर्थं तन्त्रम्** ( सुसू. १.९(७) ) रसायनतन्त्र. आयुर्वेदाच्या आठ अंगांपैकी एक. तारुण्य देणारे आयुष्य, मेधा, बल वर्धक, रोगाचे अपहरण करण्यास समर्थ असे हे शास्त्र आहे.

**रसायनपर**–वि.,**स्वभावव्याधिनिवारणविशिष्टौषधचिन्तकः रसवीर्यौषधप्रभावेण मरणनिवारकः** (सुसू. २८.५) वृद्धत्व इ० स्वाभाविक व्याधिनिवारक अशा विशिष्ट औषधींचा विचार करणारा रस आणि वीर्ययुक्त औषधीच्या प्रभावाने मरण टाळणारा ( वैद्य ).

**रसायनपाद**–पु., **अध्यायपाद०** ( चचि. १.१ ) या नांवाचा अध्यायाचा विभाग यात विशिष्ट प्रकारच्या रसायनयोगांची माहिती आहे.

**रसायनवरा**–स्त्री., **वनस्पति० काकमाची** ( ध. ४.२१ ) कावळी.

**रसायनविधान**–न., **रसायनविधिः, रसायनप्रयोगः** ( चचि. १.(२)३) रसायनप्रयोगाचा विधी.

**रसायनविधिभ्रंश**–पु., **रसायनविधौ प्रमादः, एतस्माद् व्याधयो भवन्ति। तत्र रसायनं मुक्त्वा यथास्वमौषधं देयम्** (असंउ. ४९; चचि. १(४)-२९ ) रसायन विधी देण्यात किंवा घेण्यात चूक होणे. त्यामुळे अनेक तऱ्हेचे व्याधि निर्माण होतात. त्यावेळी रसायन सोडून त्या रोगांवरील चिकित्सा करावी.

**रसायनश्रेष्ठ**–पु., **खनिज० पारदः** (रा. १३.४३) पारा.

**रसायनसमाश्रय**–न., **आहारद्रव्य० दुग्धम्** ( ध. ६.१६१ ) दूध.

**रसायनाधिकार**–पु., **रसायनस्य प्रकरणम्, अधिक्रियतेऽस्मिन्निति अधिकारः, प्रकरणम्** ( चवि. ३.३६ ) रसायनाची माहिती दिलेले प्रकरण.

**रसायनायोग्य**–वि., **रसायनोपयोगानर्हः, अनात्मवानलसो दरिद्रः, प्रमादी, व्यसनी, पापकृद्, भेषजापमानी रसायनायोग्यो मतः** ( सुचि. ३०.४ ) रसायन द्यावयास अयोग्य लोक. ( १ ) मूढबुद्धि ( २ ) आळशी ( ३ ) दरिद्री ( ४ ) गुन्हेगार ( ५ ) व्यसनी ( ६ ) पापकृत्ये करणारा ( ७ ) औषधांचा अपमान करणारा.

**रसार्णव**–पु., **रसग्रन्थ० आयुर्वेदे रसशास्त्रस्य कश्चित् प्रधानो ग्रन्थः** ( र. ११.१० ) रसशास्त्राचा एक प्रमुख ग्रंथ.

**रसाल**–पु., **वनस्पति० इक्षुः** ( **पौण्ड्रकः** ) ( ध. ४.१२० ) ऊस.
**धान्य० गोधूमः** ( रा. १६.१५१) गहूं.
**वनस्पति० आम्रः** ( ध. ५.१ ) आंबा.

**( रसाला )**–स्त्री., **वनस्पति० द्राक्षा** ( ध. ५.५६ ) द्राक्ष.
**आहारद्रव्य० शिखरिणी** ( ड. सुसू. ४६.३८४ ) **करमथितेन मरीचशर्करादियुक्तेन दध्ना कृता** (अरु.) **तद्गुणाः–बृंहणी, बल्या, स्निग्धा, वृष्या, रुचिप्रदा** ( चसू. २७.२७८ ) **प्रतिश्यायघ्नी** ( अहृउ. ४०.५१ )

शिकरण, श्रीखंड. दही हाताने कुसकरून त्यात मिरी व साखर घालून केलेली शिकरण. **गुण–** बृंहण, बल्य, स्निग्ध, वृष्य, रुचिप्रद, पडसे नाहीसे करणारी आहे.

**(रसाली)**–स्त्री., वनस्पति० इक्षुः (करङ्कशालिः) (रा. १४.१८५) ऊस.

**रसालाख्य**–पु., मूषिक० **एतद्विषतो ग्रीवास्तम्भो दंशमण्डले वेदना च जायते** (असंउ. ४६) उंदराचा एक प्रकार. याच्या विषाने मान जखडते. चावलेल्या ठिकाणी फार वेदना.

**रसावेष्ट**–पु., वनस्पति० श्रीवेष्टकः (१२. १९३) धूप देण्यास योग्य अशी वनस्पती. ऊद. धूप.

**रसिक**–वि., मधुररसम् (चइ.२.२२) मधुररस. गोडरस. धान्य० गोधूमः (ध. ६.९७) गहू. नीवारः (ध., ६.८७) देवभात.

**(रसिका)**–स्त्री., रोग० **क्षुद्रकुष्ठभेदः, कण्डूवर्तियुक्ता स्रावहीना पिडका** (र. २९.७५) क्षुद्रकुष्ठभेद. कण्डू व भुसा असणारी, स्राव नसणारी पुळी.

**रसेक्षु**–पु., वनस्पति० इक्षुः (पौण्ड्रकः) (रा. १४.१८३) उस.

**रसेन्द्र**–पु., खनिज० पारदः (ध. ६.३७) पारा.

**रसेन्द्रचूडामणि**–पु., पारदयोग० पारदयुक्तवृष्ययोगः (र. २७.१२५) एका सिद्धौषधाचे नाव. पाऱ्याचा शुक्रवर्धक एक योग.

**रसेन्द्रतिलक**–पु., ग्रन्थकार० **रसरत्नसमुच्चयकर्त्रा सिंहगुप्तसूनुना निर्दिष्टः कश्चित् रसतन्त्रकारः** (र. १.७) रसतन्त्र जाणणारा शास्त्री. याचा निर्देश रसरत्नसमुच्चयाचा कर्ता सिंहगुप्तपुत्र याने केला आहे.

**रसेन्द्रनाग**–पु., पारदयोग० **पारदसीसादिसाधितोऽयं प्रमेहकुष्ठवातनाशनः** (र. १७.६४) सिद्धौषधाचे नाव. पारा, शिसे इ० युक्त प्रमेह, कुष्ठ, वात नाशक.

**रसेन्द्रवेध**–पु., **पारदस्य द्रुतलोहादौ लेपक्षेपादिरूपेणान्तःप्रवेशः** (र. ५.५) संस्कारित पाऱ्याचा लोहादि घन धातूंना लेप करून व धातूच्या द्रवात मिश्रण करून अंतःप्रवेश घडवून आणणे.

**रसोत्तम**–पु., न., खनिज० पारदः (ध. ६.३७; चचि. २५.११६) पारा. वनस्पति० मुद्गः (ध. ६.८०) मूग. न., घृतम् (चक. चचि. २५.११६) तूप.

**रसोद्भव**–न., खनिज० रसाञ्जनम् (ध. ३.१५८; रा. १३.२२१) दारुहळदीचा शिरा. हिङ्गुलम् (रा. १३.४८) हिंगूळ.

**रसोभ्दूत**–न., खनिज० रसाञ्जनम् (रा. १३.२२१) रसांजन.

**रसोन**–पु., वनस्पति० लशुनः (चचि. ३.३०४; ध. ४.६६) लसूण.

**रसोनयोग**–पु., योग० लशुनरसायनम् (सुउ.४१.५७) द्र० 'रसायन' लसुणाचे रसायन.

**रसोपचय**–पु., (परिव०) रसपोषणम् (सुशा. ९.१०) रसाचे पोषण, वृद्धी.

**रसौदन**–पु., **मांसरसेन सिद्ध ओदनः** (चचि. १९.२५) मांसरसात शिजविलेला भात.

**रसौषधि**–पु., रसायनौषधिः (र. ३०.८२) रसायन औषधी.

**रस्या**–स्त्री., वनस्पति० रास्ना (ध. १.२७०) रास्ना.

–**रसांश**–वि., षड्भागम् **रसानां षट्संख्याकत्वेन रसपदं षडर्थकम्, अतः रसांशं नाम षड्भागम्** (र. १७.६५) रस सहा. रसांश म्हणजे सहावा भाग. एक षष्ठांश.

**रहस्**–न., एकान्तः (चशा. २.३) एकान्त.

**(रहः)–कामता**–स्त्री., लक्षण० एकान्तप्रियत्वम् (चनि. ७.७) एकान्ताची आवड.

**राक्षस**–पु., **राजससत्त्वस्यैकः प्रकारः** (चशा. ४.३८) रजोगुणी (राजस प्रकृति) माणसांचा एक प्रकार. योनि० रावणादिः (सुसू. ५.२१; चनि. ७.१०) रावण वगैरे राक्षस. भूताधिपति० (असंउ. ७) भूतांचा स्वामी. पारदयोग० **ताम्रपारदगंधकादिसाधितोऽयं मन्दाग्निनाशनः** (र. १६.१६२) एका सिद्धौषधाचे नाव. तांबे, पारा, गंधक, इत्यादी युक्त. मंदाग्निनाशक.

**(राक्षसी)**–स्त्री., वनस्पति० कार्पासी (र. १७.४१) कपाशी.

–**काय**–चित्तप्रकृति० राजसकायः (सुशा. ४.९१.९२) **राक्षसस्वभावः, तल्लक्षणम्–एकान्त–ग्राहिता रौद्रासूया धर्मबाह्यता तमोयुक्तत्वं च** (सुशा.४.९१.९२) राक्षसी स्वभावाची प्रकृति. लक्षणे– हटवादीपणा, संताप, मत्सर, धर्मबाह्य वागणे, अज्ञानी,

**—वक्त्रवत्**—वि., दिव्यौषधिसमायोगेन प्रकटकोष्ठ्यां ध्मानादखिललोहादिभक्षणे सामर्थ्यं प्राप्तः ( पारदः) महामुखवानित्यर्थः ( र. ८.७८ )
दिव्यौषधींच्या संयोगाने उघडया मुशीमध्ये फुंकल्या-मुळे लोहादिधातूंना आत्मसात करणारा (पारा) राक्षसमुखी होय.

**राक्षसोन्माद**—पु., रोग० उन्मादभेदः तल्लक्षणम्—शस्त्रशोणितमांसरक्तमाल्याभिलाषित्वं सन्तर्जकत्वं च ( चचि. ९.२० ) द्र० 'उन्माद'
राक्षसउन्माद, **लक्षण**—शस्त्र, रक्त, मांस, लाल फुले यांची इच्छा, दुसऱ्याला दटावणे.

**राग**—पु., केशरञ्जकद्रव्यम् ( चचि. २६.२८२ )
केसांना रंग आणणारे द्रव्य.
व्यञ्जन० अन्नरोचनार्थमुपयुज्यमानः, कपित्थादि-द्रव्यकृतः ( चक्र. चचि. २०.३६ )
अन्नाला रुचि येण्यासाठी कवठ वगैरे द्रव्यांपासून केलेले तोंडी लावणे.
सितारुचकसिन्धूत्थैः सवृक्षाम्लपरूषकैर्जम्बूफलरसै-र्युक्तो राजिकया कृतः, तद्गुणाः—लघुर्बृंहणो वृष्यो हृद्यो रुच्यो दीपनः, श्रमघ्नस्तृष्णामूर्च्छाभ्रमच्छर्दिघ्नः ( सुसू. ४६.३८३ )
अन्नाला चव येण्यासाठी केलेल्या चटण्या, रायती वगैरे. साखर पादेलोण सैंधव ( मीठ ) कोकम, चिंच फालसा जांभूळफळांचा रस इत्यादी पदार्थ एकत्र करून त्यामध्ये मोहरी घातलेले लोणचे हे हलके पौष्टिक, शुक्रवर्धक, हृदयाला हितकर व रुचकर अग्निदीपक, श्रमनाशक, तहान, मूर्च्छा, भ्रम, वांती नाहीसे करणारे आहे.
पानकभेदः, मधुराम्ललवणं पानकम् ( चसू. २७.२८१ )
पन्हे, पेय. गोड, आंबट व मीठ घातलेले.
रक्तिमा ( असंसू. २०.२० ) रक्तता तेजोगुणः ( सुसू. १४.९ ) रक्तिमा, लाली.
रूपम् ( सुउ. ७.२६ ) रूप.
रञ्जनम् (सुसू. १४.४) आप्यस्य रसस्य यकृत्प्लीह्नौ प्राप्तस्य रक्तीभवनम्, शुद्धस्य चेतसो रजस्तमोभ्यां रञ्जनम् ( हे. अहसू. १.१ )
आप्यरस यकृत प्लीहेमध्ये चोचून त्याला लाली येते, शुद्ध मनाला रजतमामुळे विकृती होणे.
रक्तवर्णं ताम्रपत्रम् ( र. १२.१०४ )
तांबडे, तांब्याचे पान.
मनोभाव० कामः ( र. १.१ ) कामेच्छा.
वनस्पति० अलक्तकः (रापरि. ६.१२) अळिता, लाख.

**—खाडव**—पु., आहारद्रव्य० मुद्गयूषस्य संयोगा-न्तरेण नामान्तरम्, मुद्गयूषो दाडिममृद्वीकायुक्तः, तद्गुणाः—रुच्यो लघुपाको दोषाणामविरोधकृत् ( सुसू. ४६.३६७ )
मुगाचे कढणात डाळिंब मनुका वगैरे घालून तयार केलेले सार. हे रुचकर, पचावयास हलके आहे. इतर द्रव्यांच्या संयोगानंतर मुगाच्या कढणाला हे नाव दिले जाते दोषविरुद्ध नाही.

**—दालि**—स्त्री., वनस्पति० मसूरिका ( रा. १६.१४९ )
मसूर.

**—पुष्प**—पु., वनस्पति० बन्धूकः ( रापरि. १०.३५ )
दुपारी, असाणा.

**—प्रसव**—पु., वनस्पति० कुरण्टकः ( रा. १०.४१२ )
तांबडा कोरांटा.

**—षाडव**—पु., व्यंजन० रागप्रधानः षाडवः ( चक्र. चक. ७.३३ ) तत्तु क्वथितं, गुडोपेतं, नवं सहकारफलं तैलनागरसंयुक्तम्; तद्गुणाः-कट्वम्लस्वादु-लवणो लघुः मुखप्रियो हृद्यो रोचनो दीपनश्च ( चसू. २७.२८१ )
रायते. कच्चे आंबे, गूळ, तेल, सुंठ इत्यादी घालून तयार केलेले लोणचे. लोणच्याचे **गुण**— तिखट, आंबट, गोड, खारट, लघु, तोंडाला चव आणणारे, हृदयाला हितकर व आनंददायक, रोचक, दीपन.

**—सर्षपतैल**—न., तैल० बालानां प्लीहोदरनिवर्तनार्थम् उपयुज्यते ( काककटुतैलक. २५.२६ ) द्र० 'पीतसर्षपतैल'
पिवळ्या मोहरीचे तेल. मोहरीचे तेल. मुलांचा प्लीहो-दर विकार ( प्लीहा फार मोठी होते ) नाहीसा करण्याकरिता योजतात.

**रागाङ्गी**—स्त्री., वनस्पति० मञ्जिष्ठा ( रा. ६.१८ )
मंजिष्ठ.

**रागाढ्या**—स्त्री., वनस्पति० मञ्जिष्ठा ( रा. ६.१७ )
मंजिष्ठ.

**रागिन्**—वि., रञ्जनशक्तिमान् रागिद्रव्यम्, तच्च लेपौ-षधं वर्णान्तरं नयतीत्यर्थः ( हे अहसू. २९.३ )
रंगविण्याची शक्ति असणारे द्रव्य, लेपाकरता वापरा-वयाचे औषध. औषधीलेपाने वर्ण बदलतो.

पु., वनस्पति० अशोकः ( ध. ५.१५९ ) अशोक.
धान्य० तद्गुणाः-तिक्तो मधुरः, कषायः, शीतो बल्यो रक्तपित्तघ्नः ( रा. १६.१७८ )
हिं.—मका.
म.—नाचणी.
गु.—बवटो.
बं.—मुरोआ.
ता.—इरागी.
नाचणी. **गुण**—तिक्त, मधुर, कषाय, शीत, बलकर, रक्तपित्तनाशक.

**राजन्**-पु., नृपः ( ध. ६.६० ) राजा.
खनिज० हीरकभेदः राजावर्तः ( ध. ६.६० )
हिऱ्याचा प्रकार, राजावर्त.

**( राज्ञी )**-स्त्री., वनस्पति० राजक्षवकः ( सर्षपः ) ( रा. १६.७० ) मोहरी.
कृत्रिमधातु० पित्तलम् ( ध., ६.१९ ) पितळ.
वनस्पति० नीलिनी ( रा. ४.३४९ ) काळा दाणा.

**( राज )-कन्या**-स्त्री., वनस्पति० केविका ( रापरि. १०.३३ )
अतिसुगंधी भुंग्यांना मोहक व मारक वनस्पती.

**-कशेरुक**-पु., वनस्पति० मुस्ता ( चसि. १०.३७; ध. १.४० ) नागरमोथा.

**-कसेरु**-पु., वनस्पति० मुस्ता ( ध. १.४० ) नागरमोथा.

**-कसेरुक**-पु., वनस्पति० मुस्ता ( असं. कल्प. ४ ) नागरमोथा.

**-कृष्णा**-स्त्री., वनस्पति० जन्तुका ( रा. ३.१२८ ) खाजकुहिलीच्या फळासारखी वेडीवाकडी वनस्पती माळव्यात जंतुकारी या नावाने ओळखतात.

**-कोल**-पु., वनस्पति० राजबदरः ( रा. ११.१६० ) द्र० 'बदर,' मोठे गोड बोर, उत्तम बोर.

**-कोशातकी**-स्त्री., वनस्पति० कोशातकीभेदः, धामार्गवः(चक. ४.३; ध. १.१८९)द्र० 'कोशातकी' गिलके, दोडके.

**-क्षव**-पु., शाक० दुग्धिका, लघुर्ग्राही त्रिदोषघ्नो ग्रहण्यर्शोविकारघ्नः ( हे. असंसू. ७.११३.११४ )
दुधी. मूळव्याध, ग्रहणी व त्रिदोष नाशक.
राजशाकम् ( अरु. अहसू. ६.७२ ) चाकवत.
वनस्पति० राजसर्षपकः ( र.२८.७६-७७ )
काळी मोहरी.

**-क्षवक**-पु., शाक० दुग्धिका, राजक्षकः (चसू. ४.९) काळी मोहरी.
वनस्पति० राजसर्षपकः ( ध. ४.४३) काळी मोहरी.

**-क्षवकशाक**-न., शाक० राजसर्षपकः ( सुसू. ४६.२७६ ) काळ्या मोहरीची पालेभाजी.

**-खर्जूरी**-स्त्री., वनस्पति० खर्जूरी ( रा. ११.६८ )
खजूर. चांगल्या जातीची खजूर.

**-गिरि**-पु., धान्य० राजाद्रिः, शीतो रुच्यः पित्तघ्नः ( रा. ७.१८२ पृ. २३० ) राजगिरा.

**-गेह**-न., राजगृहम् ( सुसू. ३४.१२ ) राजवाडा.

**-जम्बू**-पु., वनस्पति० महाजम्बूः द्र० ' जम्बू ' ( रा. ११.१३० ) मोठे जांभूळ.

**-तरणी**-स्त्री., वनस्पति० कषाया, सुरभिः, चक्षुष्या, हृद्या, कफकारिणी ( रा. १०.२४६ )
उत्कृष्ट शेवती. तुरट, सुगंधी, डोळ्यास व हृदयास हितकर, कफकर.

**-तरु**-पु., वनस्पति० आरग्वधः ( सुउ. ५७.१४; रा. ९.३३३ ) बहावा.

**-तैल**-न., तैलयोग० एरंडांशुमतीयवकोलादिसिद्धम् । तत्फक्करोगे उपयुक्तम् ( का. चि. फक्करोगचि. )
सिद्धतैलाचे नाव. एरंड, सालवण, जव, बोर इत्यादींनी सिद्ध. फक्करोगात बालकांना उपयुक्त.

**-दन्त**-पु., शारीर० मध्यदन्तस्य संज्ञा (कासू. २०.४) मधले- समोरचे दात.

**-द्रुम**-पु., वनस्पति० आरग्वधः ( सुक. ३.९-१० ) बहावा.

**-द्विष्ट**-वि., राज्ञो द्विष्टः राज्ञोऽप्रियः (चवि. ८.१३) राजाचा द्वेष करणारा.

**-धान्य**-न., धान्य० श्यामाकः ( ध. ६.८८ )
सावा. वऱ्याचे तांदूळ.
धान्य० व्रीहिः ( रा. १६.८१ ) तांदूळ.

**-नामा**-स्त्री., वनस्पति० पटोलम् ( ध. १.५० ) पडवळ.

**-नीलिका**-स्त्री., वनस्पति० महानीली (रा. ४.३५३) काळ्या दाण्याचा प्रकार.

**-पत्री**-स्त्री., वनस्पति० रेणुका ( ध. ३.५१ )
रेणुकबीज. सुगंधी द्रव्य.

**-पर्णी**-स्त्री., वनस्पति० प्रसारणी ( रा. ५.४३५ ) चांदवेल.

**-पलाण्डु**-पु., वनस्पति० पलाण्डुः ( रा. ७.१०३ ) पांढरा उत्कृष्ट कांदा.

**-पिण्डा**-स्त्री., वनस्पति० राजखर्जूरी ( रा. ११.६८ ) खजूर. चांगल्या प्रकारची खजूर.

**-पीलु**-पु., वनस्पति० बृहत्पीलुः ( रा. ११.६३ ) द्र० 'पीलु' पीलूचा एक प्रकार.

**-पुत्र**-पु., वनस्पति० राजाम्रः ( ध. ५.११ ) उत्कृष्ट आंबा.

**-(पुत्री)**-स्त्री., वनस्पति० जाती (ध.५.१३७) जाई.
वनस्पति० रेणुका ( रा. ६.९९ )
रेणुकबीज, एक सुगंधी द्रव्य.
कटुतुम्बी ( रा. ३.२३४ ) कडु भोपळा.
कृत्रिमधातु० पित्तलम् ( ध. ६.१९ ) पितळ.

**-पुष्पी**-स्त्री., वनस्पति० करुणी ( रापरि. १०.२७ ) ग्रीष्मांत तांबडी सुगंधी फुले येणारी वनस्पती.

**-प्रस्तर**-पु., रत्न० राजावर्तः ( ध. ६.६० ) निळसर हिरा. हिऱ्याचा एक प्रकार.

**-प्रिय**-पु., वनस्पति० राजपलाण्डुः ( रा. ७.१०३ ) द्र० ' पलाण्डु ' मऊ व पांढरा कांदा.

**( -प्रिया )**-स्त्री., धान्य० व्रीहिः ( रा. १६.११२ ) तांदूळ.
वनस्पति० करुणी ( रापरि. १०.२७ )
पहा ' राजपुष्पी. '

**-फल**-पु., वनस्पति० राजाम्रः ( रा. ११.८ ) उत्कृष्ट जातीचा आंबा.
राजादनः ( रा. ११.१४६) खिरणी.

**( -फला )**-स्त्री., वनस्पति० जम्बूः ( रा. ११.१२८ ) जांभूळ.

**-बदर**-पु., वनस्पति० बदरः ( रा. ११.१६० ) मोठे बोर.

**-बला**-स्त्री., वनस्पति० बलापञ्चकेष्वेका (ध.१.२८७) पाच प्रकारांपैकी एक प्रकारचा चिकणा.
प्रसारणी ( ध. १.२८९ ) चांदवेल.

**-भावा**-स्त्री., धान्य० व्रीहिः ( रा. १६.१०९ ) तांदूळ.

**-मात्र**-पु., राजसदृशः, ऐश्वर्ययुक्तः (चसू.२७.२०८) राजासारखे ऐश्वर्य असलेला.

**-माष**-पु., शिम्बीधान्य० कषायो मधुरः, शीतो रूक्षो वातकृद्बलदायकः, कफपित्तघ्नः (चसू.२७.२५; ध. ६.८४ )
हिं.—लोबिया.
**म.—चवळी.**
गु.—चोळा.
बं.—बरबटीकलाय.
फा.—लोबिया.
चवळी. शिंबीधान्यांपैकी एक. तुरट, मधुर, शीत, रुचकर, वात करणारे, बलदायक, कफपित्तनाशक.

**-मुद्ग**-पु., धान्य० मुद्गः, (कृष्णमुद्गः) (ध. ६.८३) काळा मूग.

**-मृगाङ्क**-पु., पारदयोग० सुवर्णरजतकान्तताम्रादिसाधितोऽयं क्षयग्रहणीपाण्डुज्वरनाशकः (र.१७.१००) एका सिद्धौषधाचे नाव. पारा सोने रुपे इत्यादी युक्त योग. क्षय ग्रहणी पांडु ज्वर नाशक.

**-यक्ष्मन्**-पु., रोग० राज्ञो नाम चन्द्रमसो यक्ष्मा रोग इति राजयक्ष्मा, राजा चासौ यक्ष्मा, राजयक्ष्मा, रोगराडित्यर्थः ( अहनि. ५.२-३ ) पूर्वं दक्षनामा प्रजापतिरभूत् । तस्य बह्व्यो दुहितरो बभूवुः। तेन च सप्ताधिका विंशतिः कन्यकाश्चन्द्राय विवोढे नाम वराय दत्ताः । स चन्द्रमास्तासु मध्ये रोहिण्यामेवानुरक्तो बभूव । ततश्च सशोकाभिरश्विन्यादिभिर्दुहितृभिरात्मपिता दक्षो रोहिणीविषयकं चन्द्रासङ्गवृत्तं श्रावितः । ततो दक्षेण दुहितॄणां वार्तामाकर्ण्य, चन्द्रमाहूय, सर्वास्वपि निजपुत्रीषु समतया वर्तनाय चन्द्रोऽभिहितः । स च तथेति स्वीकृत्यापि स्वगुरोर्वचनमनादृत्य न तासु समवर्तत । ततो दक्षप्रजापतेः क्रोधो निश्वासरूपेण मूर्तिमान् भूत्वा निःसृत्य यक्ष्मरूपेण रोहिण्यामति प्रसङ्गेनाविलं चन्द्रमाविशत् । ततोऽसौ तेन रोगेणाभिभूतः सन्गतप्रभो गतोत्साहश्च संजातः न गुरुवचनातिक्रमेण आत्मानं कृतागसं मत्वा तमेव दक्षनामानं गुरुं शरणं गतवान् । ततो देववैद्याभ्यामश्विभ्यां स उपचारितः । ततः प्राप्तबलश्चन्द्रो लब्धगुरुप्रसादोऽश्विभ्यां चिकित्सितोऽभूत् ( ड. सुउ. ४१.४.५ ) तस्य राजयक्ष्मण स्वरूपम्-शोषरूपो व्याधिः, तस्य हेतवः-सप्तधातुक्षयो वातमूत्रपुरीषादिवेगप्रतीघातो विषमाशनम् साहसं इति प्रधानहेतुचतुष्टयम् (सुउ.४१.८-९, चनि.६.३) संप्राप्तिः-कफप्रधानैर्दोषैरसवर्त्मसु रुद्धेषु अतिव्यवायिनो वा क्षीणे रेतस्यनन्तराः सर्वे धातवः क्षीयन्ते । ततो मानवः शुष्यति (सुउ. ४१.९-१० )

**पूर्वरूपाणि**— श्वासाङ्गमर्दकफसंस्रवतालुशोषवम्यग्निसादमदपीनसकासनिद्राः शुक्लेक्षणत्वं च (सुउ. ४१.२९) स्त्रीमद्यमांसप्रियता, नखकेशातिवृद्धिर्बलक्षयः (अहनि, ५.९-११) स्वप्नेषु काकशुकशल्लकिनीलकण्ठगृध्रकपिकृकलासकैरारुह्यमानमात्मानमीक्षते जलरहिता नदीः शुष्कान् पवनधूमदवार्दितांस्तरूंश्च पश्येत् (चनि. ६.१३; सुउ. ४१.३०) तल्लक्षणानि–राजयक्ष्मणो भेदाः–त्रिरूपः षड्रूप एकादशरूपश्चेति; त्रिधा, तत्र त्रिरूपः–अंसपार्श्वाभितापः, करपादसंतापः, सर्वाङ्गगज्वरः, स्वरवर्चोगदः कासोऽरुचिर्ज्वरो पार्श्वशूलं च (चचि. ८.४६; चचि. ८.५२) षड्रूपः-भक्तद्वेषो ज्वरश्वासकासरक्तष्ठीवनं स्वरभेदः, एकादशरूपः शिरसः परिपूर्णत्वं, कासः, श्वासः, स्वरभेदः, श्लेष्मणश्छर्दनं शोणितष्ठीवनं, पार्श्वसंरोजनमंसावमर्दो ज्वरोऽतीसारोऽरोचकश्चेति (चनि. ६.१४) वातजन्यलक्षणानि– शूलः स्वरभेदोंऽसपार्श्वसंकोचः, पित्तजानि–ज्वरो दाहोऽतिसारो रक्तागमः, कफजानि–शिरसः परिपूर्णत्वमभक्तच्छन्दः कासः कण्ठोद्ध्वंसः (सुउ. ४१.११-१३) उपद्रवाः–पीनसाद्येकादशरूपिणो राजयक्ष्मणः कण्ठोद्ध्वंस उरोरुजा, जृम्भाऽङ्गमर्दो निष्ठीवो वह्निसाद आस्यपूतिता इत्येवमादय उपद्रवा भवन्ति (असंनि. ५.१६) असाध्यलक्षणानि–मांसबलक्षयोऽतिसारः शूनमुष्कोदरत्वमन्नद्वेष ऊर्ध्वश्वासः कृच्छ्रेण बहुमूत्रता (मा राजयक्ष्मा ८-१२) ज्वरानुबन्धरहितं बलवन्तं क्रियासहमात्मवन्तं दीप्ताग्निमकृशं नरमुपक्रमेत् (मा. १३)

क्षय. नक्षत्रांचा राजा चंद्र. याला झालेला यक्ष्मा म्हणजे रोग म्हणून राजयक्ष्मा हे क्षयरोगाचे नाव. सर्वरोगांचा राजा म्हणूनही याला राजयक्ष्मा म्हटले आहे. रोगराट् असेहि याचे एक नाव आहे.

**पौराणिककथा**—पूर्वी दक्ष नावाचा प्रजापति होऊन गेला. त्याला बऱ्याच मुली होत्या. त्याने २७ कन्यांचा चंद्राशी विवाह करून दिला. त्यांच्यापैकी एका रोहिणीवरच चंद्र विशेष आसक्त होता. तेव्हा अश्विनी वगैरे सर्व कन्या शोकग्रस्त झाल्या. त्यांनी ती गोष्ट पित्याला कळवली. त्या दक्षाने चंद्राला बोलावून सर्वांवर सारखे प्रेम करण्याविषयी सुचवले व चंद्राने तोंडापुरते हो म्हटले पण ते वचन पाळले नाही. तेव्हा दक्षाचा क्रोध निःश्वासरूपाने बाहेर पडून देह धारण करता झाला व रोगरूपाने रोहिणीशी अतिशय रत अशा क्षीण झालेल्या चंद्रामध्ये शिरला. त्यामुळे चंद्र निस्तेज व निरुत्साही झाला. वडिलांच्या आज्ञाभंगाचे हे फळ होय असे जाणून चंद्र दक्षाला शरण गेला. तेव्हा देवांचे वैद्य अश्विनीकुमारांकडून चिकित्सा करवून चंद्राला पुनः बलवान केले.

**राजयक्ष्मस्वरूप**—दिवसेंदिवस शरीर क्षीण होत जाणे. कारणे—(१) रसादि सात धातूंचा क्रमशः किंवा शुक्राकडून उलट क्रमाने क्षय होत जाणे (२) वात, मूत्र मलादींची प्रवृत्ति अडवणे (३) भूक लागली असता अवेळी जेवणे किंवा अति थोडे अथवा अति अधिक प्रमाणात जेवणे व (४) शक्तीपेक्षा अधिक परिश्रम करणे.

संप्राप्ति—कफप्रधान दोषांनी रसवह स्रोतसांचा मार्ग अडवला तर रस, रक्त या क्रमाने किंवा अति स्त्रीसमागमाने शुक्राचा व्यय होऊन याच्या उलट म्हणजे शुक्र, मज्जा या क्रमाने सर्व धातू क्षीण होतात व त्यामुळे मनुष्य शुष्क–क्षीण होत जातो.

**पूर्वरूपे**—श्वास, अंग दुखणे, कफाचा स्राव, टाळूला शोष, ओकारी, अग्निमांद्य, माज, पडसे, खोकला, झोप, डोळे पांढरे दिसणे, स्त्रीसहवास, मद्य आणि मांसाची तीव्र इच्छा, नखे केसांची अति वाढ, बलक्षय, स्वप्नात कावळा–पोपट–साळई–मोर– गिधाड– वानर–सरडा यांच्यांवर बसून ते आपणास घेऊन जात आहेतसे दिसणे, जलरहित नद्या, झाडे वाळलेली, सोसाट्याच्या वाऱ्याने हालणारी, धूर आणि दवाने व्याप्त दिसतात.

**लक्षणे**— राजयक्ष्मरोगाचे त्रिरूप, षड्रूप आणि एकादशरूप असे तीन प्रकार होतात. (१) **त्रिरूप क्षयलक्षणे**— खांदे व फासळ्या तापणे, हात आणि पाय यांची आग होणे व सर्व अंगात ज्वर असणे (२) **षड्रूपक्षय–लक्षणे**— खोकला, अरुचि, ज्वर, बरगड्यात शूल, आवाज फुटणे, आणि द्रवमल प्रवृत्ति ही सहा किंवा जेवणाचा तिटकारा; ज्वर, श्वास, खोकला, थुंकीतून रक्त येणे आणि आवाज फुटणे ही सहा लक्षणे होतात. (३) **एकादशरूप क्षय लक्षणे**— डोके भरल्या सारखे वाटणे, खोकला, श्वास, आवाज फुटणे, कफाची ओकारी, थुंकीतून रक्त येणे, बरगड्यात पीडा, खांदे

रगडल्यासारखे वाटणे, ज्वर, अतिसार आणि अरुचि. **वातजन्य लक्षणे**— शूल, स्वर फुटणे, खांदे व फासळ्या आकुंचित झाल्यासारखी पीडा. **पित्तज लक्षणे**— ज्वर, दाह, अतिसार आणि रक्त पडणे, **कफज लक्षणे**—डोके पूर्ण भरल्यासारखे वाटणे, अन्नावर इच्छा नसणे, खोकला, घशातून चिरका आवाज येणे. **उपद्रव**— एकादश लक्षणांनंतर चिरका आवाज, छातीत वेदना, जांभया, आंग दुखणे, वारंवार थुंकी. अग्निमांद्य, तोंडाला घाण येणे इ. उपद्रव होतात. असाध्य लक्षणे— मांस बल क्षय होणे, अतिसार, वृषण आणि पोटावर सूज-अन्नद्वेष, ऊर्ध्वश्वास, कष्टाने पुष्कळ लघ्वी होणे. चिकित्सा करण्यास योग्य रोगी— ज्वर सारखा नसणे, बल कायम असणे, शोधनादि औषधोपचारांना सहन करण्याची शक्ति असणे, अग्नि प्रदीप्त असणे, कृशपणा नसणे ही लक्षणे पाहून चिकित्सा करावी,

**–यक्ष्मचिकित्सित**–न., **अध्यायसंज्ञा० अध्याय०** ( चचि. ८.१ )
या नावाचा अध्याय. यांत क्षयाचे उपचार आहेत.

**–राजिका**–स्त्री., **वनस्पति० राजक्षवकः** ( रा. १६.७० ) लाल मोहरी.

**–रीति**–स्त्री., **कृत्रिमधातु० पित्तलम्** ( ध. ६.१९ ) पितळ.

**–रोग**–पु., **रोग० राजयक्ष्मा** ( र. १४.१ ) क्षय.

**–वल्लभ**–पु., **वनस्पति० राजादनः** ( रा. ११.१४७ ) खिरणी.
**बदर० राजबदरः** ( रा. ११.१६० )
उत्कृष्ट दर्जाचे बोर.

**–वृक्ष**–पु., **वनस्पति० आरग्वधः** (चक.८.३) बहावा. **कर्णिकारः** ( ध. १.२२१ ) एक प्रकारचा बहावा.

**–शाक**–पु., **वनस्पति० वास्तुकम्** ( रापरि. ७.६२ ) चाकवत.

**–शाकिनी**–स्त्री., **वनस्पति० राजगिरिः** ( रा. ७.१८२ ) राजगिरा.

**–शेखरवटी**–स्त्री., **पारदयोग० पारदवत्सनाभगंधकादिसिद्धा, इयं अर्शःशूलपाण्डुनाशिका** ( र. १६.१५४ )
या नावाचे सिद्धौषध. पारा बचनाग गंधक इत्यादी युक्त. मूळव्याध शूल पांडु नाशक.



**–सर्षप**–पु., **वनस्पति० राजसर्षपकः** ( ध. ४.४३ )
काळी मोहरी.

**–सर्षपक**–पु., **वनस्पति० कटुस्तिक्तः, कटुपाक्युष्णो रुच्यो दीपनो दृष्टिबस्तिप्रदूषणः, पित्तलः, कफवातघ्नः, कण्ठरुक्कृमिनाशनो गुल्मकण्डूकुष्ठव्रणापहो वातशूलनुत्, पित्तदाहप्रदः** ( रा. १६.७१ )
हिं.— राई.
**म.— मोहरी.**
गु.— राई.
बं.— राजसर्षा.
ता.— वर्णाल्लु.
फा.— खरदल.
मोहरी. तिखट, कडू, पचल्यानंतर तिखट, उष्ण, रुचिकर, दीपन, दृष्टीला बस्तीला त्रासदायक, पित्तवर्धक, कफवातशामक, कंठाची पीडा व कृमी यांचा नाश करणारी. गुल्म, कण्डू, कुष्ठ, व्रण नाशक वातशूल नाशक, पित्तदाहवर्धक.

**–हंस**–पु., **पक्षि० प्लवजातीयोऽयम्** ( चसि. १२.(१) १८; चसू. २७.४१; सुसू. ४६.१०५ )
राजहंस पाण्यात विहार करणाऱ्या पक्ष्याच्या जातीपैकी एक पक्षी.

**–हर्षण**–न., **वनस्पति० तगरम्** ( र.१०.१०२) तगर.

**–हस्त**–पु., **मान० सपादहस्तास्त्रिंशदङ्गुलपरिमाणो वा** ( र. २.४ )
राजहस्त– प्रमाण. लांबी मोजण्याचे साधन. सवा हात लांब किंवा तीस अंगुळे लांबीचे भागास राजहस्त म्हणतात.

**राजत**–वि., **रजतमयम् (पात्रम्)** ( सुचि. २९.१० )
चांदीचे ( भांडे ).

**–चूर्ण**–न., **रजतस्य यत् चूर्णं तत्, सूक्ष्मं शुक्तिकाख्यनेत्ररोगेऽञ्जनार्थमुपयुज्यते** ( सुउ. १०.१५ )
चांदीचे सूक्ष्म चूर्ण. शुक्तिका नावाच्या डोळ्याच्या रोगात अंजनाकरिता उपयुक्त.

**–पात्र**–न., **रौप्यपात्रम्** ( असंसू. १०.३५ )
चांदीचे भांडे.

**–भाजन**–न., **रौप्यपात्रम्** ( सुउ. ४२.१०५ )
चांदीचे भांडे.

**राजन्य**–पु., **वनस्पति० राजादनः** ( ध. ५.९१ )
खिरणी.

**राजस**–वि., रजोगुणयुक्तः, रजोगुणेनाधिष्ठितः ( सुशा. १.१८ ) रजोगुणाने युक्त.

**–काय**–पु., चित्तप्रकृति० रजोगुणयुक्तः पुरुषः, तद्भेदाः षट् आसुरसार्पशाकुनराक्षसपैशाचप्रैतसत्त्वाः ( सुशा. ४.९४ ) तल्लक्षणानि– दुःखबहुलताऽटनशीलताऽधृतिरहंकार आनृतिकत्वमकारुण्यं दम्भो मानो हर्षः कामः क्रोधश्च ( सुशा. १.१८ ) अनार्यत्वं शौर्यं मात्सर्यममितभाषित्वं लोलुपत्वम् ( असंशा. ५ ) मध्यममनोबलयुक्तोऽन्यैः पुरुषैरवष्टभ्यमानो दुःखं सहते, रजसि मध्यमं मनोबलम् ( सुसू. ३५.३८ )

मनाची प्रकृती रजोगुणयुक्त असणे. राजसकाय प्रकृतीचे भेद सहा आहेत. ( १ ) आसुर ( २ ) सार्प ( ३ ) शाकुन ( ४ ) राक्षस ( ५ ) पैशाच ( ६ ) प्रैतसत्त्व. या राजसकाय मनःप्रवृत्ति असणारे लोकांना अनेक दुःखांना टक्कर द्यावी लागते. भटकणे हा स्वभाव बनतो, मनाला ताब्यात ठेवण्याची शक्ति कमी होते, अहंकार वाढतो. खोटे बोलतो, कठोरता–दंभ–मान– हर्ष– काम–क्रोध– आडमुठेपणा–शौर्य–मत्सर–बडबड व आसक्ति ही वाढतात. ह्या व्यक्तीचे मनाचे बल मध्यम तऱ्हेचे असते.

**राजादन**–पु., न., वनस्पति० स्वादुफलवृक्षः ( चसू. २७.१४३; सुसू. ४२.११ ) स्वादुः कषायः (च) शीतलोऽम्लो रुच्यस्तर्पणो वृष्यो हृद्यो वातःपित्तघ्नो मेहघ्नः ( ध. ५.९१ ) तत्फलगुणाः– स्वादु, कषायं, स्निग्धं, गुरु ( सुसू. ४६.१६६ )

हिं.—खिरनी.

**म.—खिरणी.**

गु.—रायण.

बं.—क्षीरिणी.

ता.—पल्ला.

खिरणी. गोड, तुरट, थंड, आंबट, रुचकर, तृप्तिकारक, शुक्रधातु व हृदय यांना हितकर, वातपित्त-नाशक, मेहनाशक आहे.

**वनस्पति० चारः** ( हे. अहसू. १०.२३; सुउ. ४८.२६ ) खिरणी.

**( राजादनी )**–स्त्री., धान्य० व्रीहिः ( रा. १६.१०९ ) तांदुळाचा एक सुगंधी प्रकार.

**राजाद्रि**–पु., धान्य० राजगिरिः ( रा. ७.१८२ ) राजगिरा.

**राजाद्रि**–पु., रत्न० राजावर्तः ( ध. ६.६० ) निळसर छटेचा हिरा.

**राजानुज्ञात**–वि., राज्ञोऽभिमतः ( वैद्यः ) ( सुसू. १०.३ ) राजमान्य वैद्य.

**राजान्न**–न., धान्य० व्रीहिः ( रा. १६.७९ ) एक प्रकारचा सुगंधी तांदूळ.

**राजाम्र**–पु., वनस्पति० आम्रभेदः, राजाम्रयुगलम्:– राजाम्रो महाराजाम्रश्च; कोमलफलस्य गुणाः– कट्वम्लं, पित्तकफास्रपवनश्वासार्तिदाहप्रदम्; सुपक्वफलस्य गुणाः–मधुरं शीतं गुरु वृष्यं पुष्टिवीर्यबलप्रदं त्रिदोषशमनं तृष्णाविदाहश्रमश्वासारोचकनाशकं च ( ध. ५.११ )

उत्कृष्ट आंबा. आंब्याचे दोन प्रकार. ( १ ) राजाम्र ( २ ) महाराजाम्र. **अगदी कोवळ्या आंब्याच्या फळाचे गुण**—तिखट, आंबट, पित्त-कफ-रक्तवात-श्वास इ० निर्माण करणारे. **परिपक्व आंबा**— मधुर, शीत, गुरु, शुक्रवृद्धिकर, पुष्टिवीर्य बलप्रद, त्रिदोषशामक, तृष्णा दाह-श्रम-श्वास अरोचक नाशक.

**राजाम्ल**–पु., वनस्पति० अम्लवेतसः ( रा. ६.१४७ ) आम्लवेतस.

**राजार्क**–पु., वनस्पति० तद्गुणाः–कटुस्तिक्तोष्णः, कफवातघ्नो मेदोविषकुष्ठव्रणशोफकण्डूविसर्पनाशकः ( ध. ४.१६ )

मोठी रुई, मंदार. **गुण**–तिखट, कडु, उष्ण, कफवात नाशक, मेद, विष, कुष्ठ, व्रण, सूज, खाज, आणि विसर्पनाशक.

**राजार्ह**–पु., धान्य० व्रीहिः ( रा. १६.८१ ) एक सुवासिक तांदूळ.

**( राजार्हा )**–स्त्री., वनस्पति० जम्बूः ( रा. ११.१२८ ) जांभूळ.

**राजावर्त**–पु., रत्न० द्र० 'हीरक' ( ध. ६.६० ) हिरा. **आवर्तमणिः** (र. ३.११९) तस्य शोधनम्–शिरीषपुष्परसैस्तथा च शृङ्गवेररसै राजावर्तः शुद्धो भवति ( र. ३.१६९ ) तस्य मारणम्–जम्बीररसगन्धकसहितो राजावर्तः सप्तवारेण पुटनात् म्रियते ( र. ३.१७० ) तस्य सत्वपातनविधिः– राजावर्तस्य चूर्णं तु खदिराङ्गारैर्ध्मापितं सत्त्वं मुञ्चति ( र. ३.१७१ ) तद्गुणाः– कटुः शीतः स्निग्धः पित्तघ्नः ( ध. ६.६० )

राजावर्तमणि. हिऱ्याचा प्रकार. त्याचे शोधन–शिरसाच्या फुलांच्या रसात तसेच आल्याच्या रसात

राजावर्त शुद्ध होतो. राजावर्तमारण–लिंबु रस व गंधक यांत सात वेळा पुटे द्यावी. **राजावर्तसत्वपातन**—राजावर्ताचे चूर्ण खैराचा अग्नि दिल्याने सत्त्व सोडते. त्याचे गुण–तिखट, शीत, स्निग्ध, पित्तनाशक.

**राजावर्तरस**–पु., पारदयोग० **पारदशुल्बमधुकराजावर्तादि साधितोऽयंसर्वमदात्ययहरः** (र. १४.१०४) सिद्ध औषधाचे नाव. पारा, तांबे, ज्येष्ठमध, राजावर्त इ० युक्त. सर्व मद्यपानजन्य विकार नाशक.

**राजाह्व**–न., वनस्पति० **कर्णिका** (अरु. अहृसू. १५.१३) पांगारा, बहावा.

**राजादनः** ( हे. अहृसू. १५.१३ ) खिरणी.

**आरग्वधः** ( अरु. असंसू. १६.७ ) बहावा.

**राजि**–स्त्री., **पङ्क्तिः** ( असंसू. ८.११ ) ओळ.

**–चित्र**–पु., सर्प० **राजिमान्** (सुक. ८.३४-(४)) सापाची जात.

**–चित्रक**–पु., सर्प० **वैकरञ्जेभ्यस्त्रिभ्यो जातः सर्पः** ( सुक. ४.३४ ) द्र० **' राजिमत '** सापाची जात. वैकरंज मादीपासून झालेला.

**–फल्गु**–पु., वनस्पति० **काकोदुम्बरिका** ( ध. ५.८८ ) उंबराचा एक प्रकार, अंजीर, काळा उंबर, खर्वती.

**राजिका**–स्त्री., वनस्पति० **तद्गुणाः–कटुस्तिक्तोष्णा, निद्रा दाहपित्तकरी, कफवातघ्नी, कुष्ठगुल्मशोफग्रहविकारप्लीहाशूलकृमिव्रणनाशनी च** (ध. ४.६०)

हिं.—राई.

**म.—मोहरी.**

गु.—राई.

बं.—राजसर्षा.

ता.—वर्णाल्लु.

मोहरी. तिखट, कडू, उष्ण, निद्रा दाह पित्त करणारी, कफवातशामक, कुष्ठ-गुल्म-सूज-ग्रह विकार-प्लीहा-शूल-कृमि-व्रण नाशक.

**काकोदुम्बरिका** ( रा. ११.१४२)

एक प्रकारचा उंबर, काळा उंबर, खर्वती.

**राजसर्षपकः** ( ध. ४.४३ ) काळी मोहरी.

**क्षुद्ररोग० घर्मस्वेदपरीतेऽङ्गे जायमानाः सरुजो घना राजिकाकारवर्णाः पिटिकाः** ( र. २५.१ )

एका क्षुद्ररोगाचे नाव. उन्हामुळे येणारा घामाचा पुरळ. घामट अंगावर ठणका असणाऱ्या घट्ट अशा पुळ्या मोहरीच्या आकाराच्या व वर्णाच्या होतात.

**–पत्र**–न., वनस्पति० **तद्गुणाः–कटु, स्वादूष्णं वह्निदीपनं वातकफापहं, कृमिकण्ठामयहरम्** ( रा परि. ७.८४)

मोहरीचे पान. गुण.– तिखट, गोड, उष्ण, अग्निदीपक, वातकफनाशक, कृमि व घशाचे रोग हारक.

**–फल**–पु., वनस्पति० **सर्षपः** ( ध. ४.४२ ) मोहरी.

**राजिकाह्वया**–स्त्री., क्षुद्ररोग० **राजिका** ( असंउ. ३६ ) क्षुद्ररोग. पुळी.

**राजिमत्**–पु., सर्प० **बिन्दुलेखाभिरस्याङ्गं चित्रितमस्तीति राजिमान्** ( चचि. २३.१२५ ) **रेखायुक्तः फणावर्जित ईषद्विषः** ( ड. सुक. ४.१० ) **तस्य च राजिमतो दंशः पिच्छिलः स्थिरशोफकरः स्निग्धः पाण्डुः सान्द्रासृक्श्लेष्मव्याधिकरः** ( चचि. २३.१२९ ) **द्वादशभेदाः–पुण्डरीको राजिचित्रो बिन्दुराजिः कर्दमकोऽङ्गुलराजिस्तृणशोषकः सर्षपकः श्वेतहनुर्दर्भपुष्पश्चक्रको गोधूमकः किक्किसादः** (सुक. ४.३४३) **तद्विषलक्षणानि–त्वगादीनां शुक्लत्वं, शीतज्वरो रोमहर्षो गात्राणां स्तब्धत्वं, सान्द्रकफप्रसेकआदंशशोफोऽभीक्ष्णमक्ष्णोः कण्डूश्छर्दिः कण्ठे श्वयथुर्घुर्घुरक उच्छ्वासनिरोधः तमःप्रवेशः तास्ताश्च कफवेदनाः** ( सुक. ४.३७ )

राजीमत सापाचे नाव आहे. ठिपके व रेषा ज्याचे अंगावर असतात असा फणा नसलेला साप. याचे विष थोडे असते. बुळबुळीत व स्थिर अशी सूज उत्पन्न करणारा, स्निग्ध, पांढरा व घट्ट असा दंशातून रक्तस्राव व कफविकार करणारा साप. त्याचे बारा भेद आहेत. ( १ ) पुंडरीक ( २ ) राजीचित्र ( ३ ) बिन्दुराजि ( ४ ) कर्दमक ( ५ ) अंगुलराजि ( ६ ) तृणशोषक ( ७ ) सर्षपक ( ८ ) श्वेतहनु ( ९ ) दर्भपुष्प ( १० ) चक्रक ( ११ ) गोधूमक ( १२ ) किक्कसाद. तो चावल्याच्या विषाची लक्षणे– त्वचा पांढरी होते, थंडी वाजून ताप येतो, अंगावर रोमांच उभे रहातात, गात्रे स्तब्ध होतात. घट्ट कफाचा प्रसेक सुरु होतो. दंश झालेल्या ठिकाणी सूज उत्पन्न होते. डोळ्यांना खाज येते. ओकारी, गळ्यात सूज येऊन घुर घुर आवाज येतो. श्वासाला अवरोध चक्कर व इतर कफ वेदना होतात.

**राजिलफला**–स्त्री., वनस्पति० **चीणाकर्कटी** (रा. ७.२६० ) काकडीचा प्रकार. चिकण काकडी.

**राजी**–स्त्री., **सूत्रवद्रेखा** ( चइ. ११.१३ ) शरिरावर पडणाऱ्या वळ्या, रेषा.

वनस्पति० राजिका ( ध. ४.६० ) मोहरी.
वनस्पति० बाकुची ( रा. ४.२२७) बावची.
-जन्मन्-न., लक्षण० व्यक्तसिरात्वम्, राजीनां जन्म नाम अभिव्यक्तिः ( चचि. १३.१९ )
शरिरावर शिरा स्पष्ट दिसू लागणे.
-फल-पु., वनस्पति० पटोलम् (ध. १.५०) पडवळ.

**राजीमत्**-वि., लक्षण० नीलपीतादिरेखायुक्तम् (ड सुउ. ४०.२०) निळ्या पिवळ्या रंगाच्या रेषा.
पु., भौमसर्प० राजिमान् ( असंउ. ४१ )
सापाची जात.

**(राजीमती)**-स्त्री., शालिशूकाभराज्यावृतेव तारा दृष्टिर्वा ( असंउ. १७ )
लिंगनाशाच्या सहा उपद्रवांपैकी एक. त्यामध्ये डोळ्याच्या बाहुलीवर भाताच्या साळीच्या तुसासारख्या रेषा निर्माण होतात.

**राजीव**-पु., मत्स्य० नादेयोऽयम् ( सुसू. ४६.११३)
नदीत सापडणारा राजीव जातीचा मासा.
सामुद्रोऽयं, वज्राभो बह्वायतोऽसौ ( सुसू. ४६.११८-११९ )
वज्रासारखा पुष्कळ लांब व समुद्रात असणारा.
प्राणि० जङ्गाल ( जातीयः ) ( ध. २.३; पृ. २८६ )
मांड्या पुष्ट असणाऱ्या हरणाच्या जातीचा प्राणी.
न., वनस्पति० रक्तपद्मम् ( ध. ४.१५२ )
तांबडे कमळ.
कमलम् ( रा. १०.२४४ ) कमळ.
-मत्स्य-पु., मत्स्य० नादेयोऽयम्, आलाल ( र ) विषः( सुक. ३.६; सुसू. ४६.११३; सुसू. ४६.११८-११९ )
नदीतला एक विषारी मासा. याच्या लाळेत विष असते.

**राजेष्ट**-पु., वनस्पति० राजपलाण्डुः ( रा. ७.१०४ )
द्र० 'पलाण्डु' पांढरा मऊ कांदा.
न., धान्य० व्रीहिः ( रा. १६.८१ )
एक प्रकारचा सुवासिक तांदूळ.

**(राजेष्टा)**-स्त्री., वनस्पति० कदली ( रा. ११.१०७ )
केळ.
राजखर्जूरी ( रा. ११.६८ ) द्र० 'खर्जूरी'
उत्कृष्ट खजूर.

**राजोद्वेजन**-पु., वनस्पति० क्षुवकः ( रापरि. ९.४० )
तिळवा. शिंका आणणारी वनस्पती.

**राट**-पु., वनस्पति० मदनः ( ध. १.१६८ ) गेळफळ.

**राठ**-पु., वनस्पति० मदनः ( चक. १.२७ ) गेळफळ.

**राड्वर्त**-पु., रत्न० राजावर्तः ( र. १७.८९ )
हिऱ्याचा एक प्रकार.

**राढ**-पु., वनस्पति० मदनः (चचि. २६.१४) गेळफळ.

**रात**-पु., वनस्पति० मदनः (असंक. १) गेळफळ.

**रात्रि**-स्त्री., रजनी ( सुशा. ४.३८ ) रात्र.
वनस्पति० हरिद्रा ( सुचि. ९.१२; र. ५.११७ )
हळद.
-जागरण-न., रात्रौ जागरणम्, तेन वातपित्त-निमित्ताः कासश्वासप्रतिश्यायाद्योरोगा भवन्ति ( सुशा. ४.३८ )
रात्रीचे जागरण. याने वात, पित्त, श्वास, खोकला, पडसे इत्यादी रोग होतात.
-बलिन्-वि., रात्रौ बलवान् ( चचि. १२.१४ )
रात्री बलवान. वाढणारा.

**रात्रिक**-पु., वृश्चिक० साध्यसंज्ञोऽयं वृश्चिकः रात्रि-विचरणाद् रात्रिकः ( असंउ. ४३ ) विंचू.

**रात्र्यन्ध**-न., नेत्ररोग० नक्तान्ध्यम् द्र० 'नक्तान्ध्य' ( र. २३.६३ ) रातांधळे.

**रात्र्यन्धहराञ्जन**-न., अञ्जन० इदं रात्र्यन्धत्वनाशनम् (र.२३.६१) सिद्ध अंजनाचे नाव. रातांधळे नाशक.

**रात्र्यान्ध्य**-न., लक्षण० कफविदग्धदृष्टिः, रात्रावन्धत्वम् ( सुउ. १७.१६-२६ ) रातांधळे.

**रानकदली**-स्त्री., वनस्पति० काष्ठकदली ( ध. ४.७८ )
रानकेळ.

**राम**-पु., प्राणि० महामृगः, हिमालयवासी जाङ्गलमृगः ( चसू. २७.४५ ) जङ्घालमृगः ( ड. सुसू. ४६.५४ )
महामृग, हिमालयवासी एक हरिण.
न., वनस्पति० तमालपत्रम् (ध.२.५२) तमालपत्र.
कुष्ठम् (ध. ३.४९) कोष्ठकोळिंजन, कोठ.

**(रामा)**-स्त्री., स्त्री ( र. ११.१०१ ) स्त्री.
वनस्पति० आरामशीतला ( रा. परि. १०.५२ )
उग्रगंधी वनस्पती.
वनस्पति० कुमारी ( रा. परि. ५.११ ) कोरफड.
लक्ष्मणा ( रा. ४.१२४ ) पांढरी रिंगणी.
भैषज्य० गोरोचना ( रा. १२.३४ ) गोरोचन.
-काण्ड-पु., वनस्पति० अपर्वदण्डः ( रापरि. ८.३६)
रामबाण. माळव्यात अपर्वदंड या नावाने प्रसिद्ध.
-तरणी-स्त्री., वनस्पति० तरणी (ध. ५.१४५) शेवंती

सैर्यकः ( इन्दु. असंउ. २८ ) कोऱ्हांटी.

**-बाण**-पु., वनस्पति० **अपर्वदण्डः** ( रापरि. ८.३६ ) रामबाण, अपर्वदंड. माळव्यात प्रसिद्ध.
**पारदयोग० पारदतारनागस्वर्णादिसाधितोऽयं सर्वप्रमेहनाशकः** ( र. १७.८८९-९३ ) सिद्धौषधाचे नाव. पारा, रुपे, शिसे, सोने इ० युक्त. प्रमेह नाशक.

**-वल्लभ**-न., वनस्पति० **त्वक्** ( रा. ६.७६ ) दालचिनी.

**-शर**-पु., वनस्पति० **अपर्वदण्डः** ( रापरि. ८.३६ ) रामकांड.

**-शीतलिका**-स्त्री., वनस्पति० **आरामशीतला** (र.१३.१३-१९) उग्रगंधी वनस्पती.

**-सेनक**-पु., वनस्पति० **किराततिक्तः** ( ध. १.३३ ) काडेचिराईत.

**रामठ**-न., **निर्यास० हिङ्गु** ( ध. २.३६ ) हिंग.

**( रामठी )**-स्त्री., वनस्पति० **नाडीहिङ्गु, हिङ्गुपत्री** ( ध. २.४० ) बाफळी, हिंगुपत्री.

**रामण**-पु., वनस्पति० **कैडर्यनिम्बः**(रा.९.४८) पर्वतनिंब.
वनस्पति० **तिन्दुकः** ( ध. ५.४० ) टेंभुर, टेंभुरणी.

**रामा**-स्त्री., ( र. ११.१०१ ) स्त्री.

**-वामाङ्घ्रिघातक**-पु., वनस्पति० **अशोकः** ( रा. १०.२७२ ) अशोक.

**रामालिङ्गनकाम**-पु., वनस्पति० **कुरुबकः** ( रा. १०.४१३ ) लाल कोरांटी.

**रामेषु**-पु., वनस्पति० **अपर्वदण्डः** ( रापरि. ८.३६ ) रामकाण्ड.

**राल**-पु., निर्यास० **शालवृक्षस्य निर्यासः, तद्गुणाः-मधुरः कषायः तिक्त उष्णः ( शीतः-(रा) ) स्तम्भनो व्रणरोपणो वातपित्तघ्नः स्फोटकण्डूतिव्रणनाशनो विषादि-भूतहन्ता भग्नसंधानकृत्** ( ध. ३.१२१; रा. ९.२०४ ) **अयं सुरभिर्धूपः** ( ध. ३.१२१ )
हिं.—साल.
**म.—साल. राळेचा वृक्ष.**
बं.—साल.
राळ. साळईचा डिंक. गुण— मधुर, तुरट, कडू, उष्ण, स्तंभक, व्रणरोपक, वातपित्तशामक, फोड-कंडू-व्रणनाशक, विषनाशक, संधान करणारा, हा सुगंधी धूप आहे.

**(राला)**-स्त्री., वनस्पति० **शालनिर्यासः, रालः** ( ध. ३.१२१ ) राळ,

**रालक**-पु., निर्यास० **रालः** ( असंसू. ७ ) राळ.

**राशि**-पु., **समुदायः** ( चशा १.३५ ) ढीग, रास.
**प्रमाणम्, परिमाणं वा** ( चक्र. चवि. १.२२ ) प्रमाण, मोजमाप.

**राष्ट्रिका**-स्त्री., वनस्पति० **बृहती** ( ध. १.९३ ) रिंगणी, डोरली.

**रासभ**-पु., पशु० **गर्दभः** ( सुचि. ७.१८-१९ ) गाढव.

**-वर्चस्**-न., **गर्दभपुरीषम्, तदिदं मूत्ररुजापहम्** ( सुउ.५८.३५ ) गाढवाची विष्ठा, लेंडी. ही मूत्रमार्गातील वेदना कमी करते.

**रासायन**-वि., **रसायनस्यायं रासायनः, रसायनसम्बन्धी** ( सुचि. २७.४ ) रसायनाचे ते रासायन, रसायनासंबंधी.

**रास्ना**-स्त्री., वनस्पति० **तृणविशेषः, अनुवासनोपगगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१३ ) **शीतापनयनप्रलेपनानां श्रेष्ठा** ( चसू. २५.४० ) **तद्गुणाः—तिक्तोष्णा गुरुः पाचनी, कफघ्नी; वातहराणां श्रेष्ठा** ( च ), **विषवातरक्तकासशोफकम्पोदरनाशिनी** ( ध. १.२७० ) **पार्श्वरुजाघ्नी** ( चसू. ३.२५ ) **श्वासशूलज्वराशीतिवातविकारहृत्** ( भाप्र ) **आमवातनाशिनी** ( र. १३.७४-७५ )
रास्ना. एक गवत. स्नेहनबस्तीला उपयुक्त. थंडी नाहीशी करणाऱ्या लेपाच्या द्रव्यात श्रेष्ठ. गुण—कडू, उष्ण, गुरु, पाचन, कफनाशक, वातहर द्रव्यात श्रेष्ठ, विष-वातरक्त-खोकला-सूज-कंप-उदर नाशक. फासळीतील वेदना, शूल, ज्वर, आमवात व ८० वात विकार नाशक.
वनस्पति० **सुरभी** (ड. सुसू. ३८.१६-१७) सुगंधी.
**सुरसा** ( सुचि. ५.७ ) तुळशी.
**लक्ष्मणा** ( रा. ४.१२५ ) पांढरी रिंगणी.
**शाक०** ( असंसू. ७.१४८ ) भाजीचा प्रकार.

**-यूष**-पु., **यूष० वातघ्नोऽयम्** (का खिल. ४.५३-५४) रास्ना कढण. हे वातनाशक आहे.

**राहु**-पु., वनस्पति० **मदनः** (रा. ८.२३०) गेळफळ.

**-च्छत्र**-न., वनस्पति० **आर्द्रकम्** (ध. २.८५) आले.

**-दर्शन**-न., **राहोर्दर्शनम्** ( चइ. १२.६९ ) राहूचे दर्शन.

**रिक्त**-वि., **तुच्छम्, स्नेहादिगुणशून्यम्** ( चक्र. चचि. २८.१८ ) **निष्फलम्** (चइ.१२.६९) तुच्छ, स्नेहादि गुण नसलेले, रिकामे, निष्फळ,

**रिङ्गिणी**–स्त्री., वनस्पति० मुद्गपर्णी ( ध. १.१३८ ) रानमूग.
कण्टकारी (र. १६.७३ ) रिंगणी.
कैवर्तिका ( रा. परि. ३.३५ )
वस्त्र रंगविण्यास उपयुक्त. झाडावर चढणारी वेल.

**रिपु**–पु., वनस्पति० चोरकः ( ध. ३.७१ ) चोरओवा.

**रिष्ट**–न., लक्षणम् ( चसू. ३०.२५ ) भविष्यतो मृत्यो-र्लक्षणम् । रिष्टेन विना मरणं नास्ति, रिष्टदर्शने जीवितं नास्ति । स्थाय्यस्थायि भेदेन द्विविधं रिष्टमिति कृष्णात्रेयः ( अरु. ) दोषाणां बाहुल्याद्रिष्टाभासो भवति । दोषशमे तच्छमनमिति तदस्थायि, स्थायित्वमवश्यं मृत्यवे कल्पते ( अहृशा. ५.३ ) रूपमिन्द्रियस्वरच्छाया-प्रतिच्छायाक्रियादिष्वन्येष्वपि प्राकृतेषु भावेष्वनिमि-त्ततो विकृती रिष्टमिति सामान्यतो बोध्यम् । कानि-चिद्रिष्टलक्षणानि–यस्य केशरोमाणि निरभ्यंगानि अपि अभ्यक्तानि इव ईक्ष्यन्ते । नेत्रलक्षणानि–अत्यर्थं चले स्तब्धान्तर्गतनिर्गते जिह्मे विस्तृतसंक्षिप्ते संक्षिप्तविनतभ्रूलते उद्भ्रान्तदर्शने हीनदर्शने नेत्रे। अत्यर्थविवृता संवृता वा पिटिकाचिता शोथाक्रान्ता स्फुटिता म्लाना नासिका। पक्वजम्बूफलनीलौ ओष्ठौ। सशर्कराः श्यावास्ताम्राः पुष्पितपङ्क्तिता दन्ताः सहसैव पतेयुर्वा। जिह्वा विसर्पिणी शूना शुष्का गुरुः श्यावा लिप्ता सुप्ता सकण्टका जिह्वा ( अहृशा. ५.६-११ ) यस्य सततोष्मसु गात्रेषु भृशमौष्ण्यमहेतुकः स्वेदः स्तम्भो वोपलक्ष्यते। निर्निमित्तं बलवर्णहानिः स्वरभेदो वा ( अहृशा. ५.३९-४० ) रिष्टज्ञानो वैद्य आदरणीयः आयुर्वेद-विदि वैद्ये आयुर्वेदफलं सकलं प्रतिष्ठितं तस्माद्रिष्टज्ञानादृतो भिषग्भवेत् (अहृशा. ५.१३१) मृत्युदर्शक चिन्ह. रिष्टाशिवाय मरण नाही. रिष्ट दिसले म्हणजे जीवन संपले असे समजावे. काहींचे मते त्याचे दोन प्रकार आहेत. एक स्थायी आणि अस्थायी. दोषांच्या बाहुल्याने भासमान होणारे आणि दोषशमनाबरोबर कमी होते ते अस्थायी लक्षण. दोष, शरीर आणि मन यांवर एकाएकी उत्पन्न होणारे ते स्थायी; त्याने निश्चितच मरण येते. कारणाशिवाय रूप, इंद्रिये, स्वर, छाया, प्रतिच्छाया, क्रिया यांपैकी कोणाचे तरी एकाचे प्राकृत स्वरूप जाऊन काहीही कारण नसता विकृती उत्पन्न होणे ही गोष्ट सामान्यतः रिष्ट समजावी. नमुन्यादाखल काही रिष्ट लक्षणे—ज्यांचे केस आणि शरिरावरील लव (केस) तेल लावल्या शिवायच तेलकट दिसू लागतात; एकाएकी डोळ्याची हालचाल बंद होऊन डोळे आत जाणे–बाहेर येणे–वाकडे किंवा मोठे होणे, नाकपुडी अतिशय विस्तृत होणे किंवा संकुचित होणे, बारीक पुळ्या उत्पन्न होऊन सूज येऊन चिरा पडणे–गळून जाणे, श्वासोच्छ्वासास अडथळा येईल अशी होणे, पिकलेल्या जांभळाप्रमाणे ओठ निळे होणे, दातामध्ये एकाएकी किट्टण निर्माण होणे, दात निळे काळे होणे, तांबडे होणे, दातावर फुलीसारखे डाग किंवा चिखल जमल्यासारखे होणे, दात एकाएकी पडणे, जीभ वेडीवाकडी–नेहमी आत बाहेर येणारी–सुजलेली–वाळलेली–जड– काळी– लपेटलेली– काटेयुक्त अशी एकाएकी होणे, सतत नेहमी सारखे उष्णता असणारे अवयव अकारण एकाएकी अधिक उष्ण होणे आणि त्यातून घामाच्या धारा लागणे किंवा तो भाग ताठर होणे, कारणाशिवाय बलवर्ण नाश होणे, आवाज बसणे. रिष्टाचे ज्ञान असणाराच वैद्य आयुर्वेदाचे श्रेष्ठत्व सिद्ध करतो व आदरणीय असतो. चिकित्सेचे संपूर्ण फळ आयुर्वेदवेत्त्या वैद्यावर व अवलंबून असते. म्हणून वैद्याने रिष्ट लक्षणे फार दक्षतेने जाणून घेतली व अभ्यासली पाहिजेत.

**–लक्षण**–न., लक्षण० भविष्यतो मृत्योर्लक्षणम् ( चइ. ८ )
मरण नजीक आले आहे असे दाखविणारे चिन्ह.

**–विज्ञान**–न., रिष्टज्ञानम् ( असंशा. १०.३२ )
मरणचिन्हांचे ज्ञान.

**रिष्टाभास**–पु., आभासरूपं रिष्टलक्षणम्
( असंशा. १०.३४ ) मृयुत्दर्शक चिन्हाचा आभास.

**रीठा**–वनस्पति० रीठाकरञ्जः ( रा. ९.१८६ ) रीठा.

**–करञ्ज**–पु., वनस्पति० करञ्जभेदः तद्गुणाः–तिक्तः कटुरुष्णः स्निग्धो वातकफघ्नः कुष्ठकण्डूति-विषविस्फोटनाशनः ( रा. ९.१८६ )
हिं.—रिठा.
**म.—रिठा, रीठा.**
बं.—बारारिठा.
ता.—पूनन कोट्टाई.
फा.—राथोह.
रीठा–करंज. **गुण**—कडू, तिखट, उष्ण, स्निग्ध, वातकफनाशक. कुष्ठ–कंडू–विष व फोड नाशक.

**रीति**–स्त्री., कृत्रिमधातु० पित्तलम् जसदम् (चसू. ५.७४) पितळ, जसद.

**–कुसुम**–न., खनिज० पुष्पाञ्जनम् (ध. ३.१६२) जस्ताचे फूल.

**–ज**–न., खनिज० पुष्पाञ्जनम् (ध. ३.१६२) जस्ताचे फूल.

**–पुष्प**–न., खनिज० पुष्पाञ्जनम् (ध. ३.१६२) जस्ताचे फूल.

**रीतिक**–न., खनिज० पुष्पाञ्जनम् (रा. १३.२२४) एक प्रकारचा सुरमा. जस्ताचे फूल.

**(रीतिका)**–स्त्री., कृत्रिमधातु० पित्तलम् (ध. ६.१८) पितळ.

**रुक्**–स्त्री., लक्षण० वेदना (चसू. २८.१७) पीडा, वेदना.

**रुक्म**–न., खनिज० सुवर्णम् (ध. ६.१) सोने.
वनस्पति० नागकेसरम् (रा. ६.७४) नागकेशर.

**–लोह**–न., खनिज० तीक्ष्णलोहम्, सुवर्णसदृशसार-लोहम् (र. २८.४८-५१) सोन्यासारखा लोह धातु–पोलाद.

**–सार**–खनिज० सुवर्णस्य प्रसादभागः (सुशा. ४.२६-२७) सुवर्णाचा निर्मळ भाग.

**रुक्मिणी**–स्त्री., वनस्पति० काञ्चनक्षीरी (रा. ५.३६५) काटेधोतरा, पिवळा धोत्रा, पिसोळा, पिसोळी.

**रुग्ण**-वि., आतुरः रोगी (सुसू. ४२.१०(२); चसि. १.३२) रोगी. आजारी.

**रुचक**–पु., वनस्पति० मातुलुङ्गः (ध. ५.२३) महाळुंग.
न., लवण० सौवर्चलम् (ध. २.३०) काळे मीठ. पादेलोण.
अस्थि० दशना रुचकानि (सुशा. ५.२०) दात.
कण्ठभूषणम् (चइ. १२.७७; सुउ. ३१.७) गळ्यातील दागिना.

**–भूषणा**–वि., मूले धृताङ्गुलीयका (हे. अहसू. २५.९) हाताने धरण्याचे ठिकाणी अंगठीसारखी मुद्रिका घातलेले यंत्र.

**रुचि**–स्त्री., भैषज्य० गोरोचना (ध. ३.२०) गोरोचन.
अन्नास्वादः (चसू. १६.५) अन्नाची रुची.
प्रीतिः (अहसू. ११.३) प्रेम.

**–कारिणी**–स्त्री., वनस्पति० द्राक्षाभेदः, काकलीद्राक्षा (रा. ११.७९) द्राक्षांचा एक प्रकार.

**–द**–वि., रुचिकारकम् (अहसू. ४.२९) रुचि करणारे.

**–रञ्जन**–पु., वनस्पति० शिग्रुः (रा. ७.६२) शेवगा.

**रुचिर**–न., खनिज० रौप्यम् (ध. ६.५; रा. १३.७) रुपे, चांदी.
वनस्पति० लवङ्गम् (रा. १२.८४) लवंग.
मूलकम् (रा. ७.५१) मुळा.

**(रुचिरा)**–स्त्री., भैषज्य० गोरोचना (ध. ३.२०) गोरोचन.

**–फला**–स्त्री., वनस्पति० मधुर–बिम्बी (रा. ७.३०४) द्र० 'बिम्बी', गोड तोंडली.

**रुचिष्य**–न., वनस्पति० मूलकम् (ध. ४.३३) मुळा.

**रुच्य**–पु., वनस्पति० कतकम् (रा. ११.२३५) निवळी.
जीरकम् (ध. २.६६) जिरे.
धान्य० व्रीहिः (रा.१६.७८) तांदळाचा एक प्रकार.
न., बीज० निर्मलीबीजम् (र. १७.४८-५०) निवळीचे बी.

**(रुच्या)**–स्त्री., वनस्पति० कृष्णजीरकः (रा. ६.१०४) द्र० 'जीरक' जिरे.

**–कन्द**–पु., वनस्पति० सूरणः (रापरि. ७.६) सुरण.

**रुच्यक**–न., लवण० सौवर्चलम् (रा. ६.३८) पादेलोण, काळे मीठ.

**रुज्**–स्त्री., रोगः (अहसू. १२.४९) रोग.
रुजा, पीडा (र. २.३) पीडा.
लक्षण० वेदना (चसू. २८.१७) वेदना.
वनस्पति० कुष्ठम् (सुउ. ४२.२९) कोष्ठकोळिंजन.

**रुजा**–स्त्री., वनस्पति० कुष्ठम् (ध. ३.४९) कोळिंजन.
लक्षण० वेदना (सुनि. ९.१०-११) वेदना.

**–कर**–वि., वेदनाकरः (सुशा. ६.१४; असंसू. १६.१५) वेदना करणारा.
वनस्पति० हिन्तालः (अहसू. १५.२१) शिंदी.

**–सह**–पु., वनस्पति० धन्वनः (रापरि. ९.२०) धावडा.

**रुजापह**–वि., रुजानाशकः (सुचि. २४.३१) पीडा नाहीशी करणारा.
पु., वनस्पति० धन्वनः (रापरि. ९.२०) धावडा.

**रुज्जा**–स्त्री., क्षुद्ररोग० कपालगतोऽयम्, इन्द्रलुप्तम् (असंउ. २७) चाई.

**रुज्या**–स्त्री., क्षुद्ररोग० इन्द्रलुप्तम् (सुनि. १३.३३-३४) चाई.

**रुणशालि**–पु., वनस्पति० व्रीहिः ( रा. १६.१०४ )
तांदळाचा एक वर्ग.

**रुणाली**–स्त्री., वनस्पति० व्रीहिः ( रा. १६.१०४ )
तांदुळाचा एक वर्ग.

**रुदन्तिका**–स्त्री., वनस्पति० रुदन्ती ( र. २०.६८-७४ )
रुद्रवंती, रुदन्ती.

**रुदन्ती**–स्त्री., वनस्पति० तद्गुणाः– कटुस्तिक्तोष्णा, रसायनी, कफघ्नी, क्षयकृमिरक्तपित्तश्वासमेहहारिणी ( रापरि. ५.१५; र. ४.६८ )
रुद्रवंती, रुदंती. गुण– कडु, तिखट, उष्ण, प्रशस्तधातुकारिणी, कफनाशक, क्षय-कृमि-रक्तपित्त-श्वास-मेह नाशक.

**रुदित**–न., रोदनम् ( सुशा. ९.५ ) रडणे.

**रुद्ध**–वि., प्रतिहतम् ( असंशा. १२.११ ) अडलेले.

**–गुद**–पु., न., क्षुद्ररोग० सन्निरुद्धगुदम् ( असंउ. ३६ )
अडथळा येऊन किंवा संकुचित होऊन गुदमार्गाचा अवरोध होणे.

**–मणिक**–पु., रोग० निरुद्धमणिः (असंसू. ३४.१३) यांत लिंगाच्या मण्यावरची त्वचा संकुचित होते व मण्याची त्वचा मागे सरकत नाही.

**–शब्द**–पु., लक्षण० रुद्धशब्दोच्चारणम्
(सुसू.२९.४३) शब्दाचा उच्चार करण्यास अडचण.

**रुद्र**–पु., देवताविशेषः (सुशा. ४.७६ ) शंकर.
एकादशो भागः ( र. ४.५० ) अकरावा भाग.

**( रुद्रा )**–स्त्री., वनस्पति० रुद्रजटा (रापरि. ३.२४)
जटायुक्त सुंगधी पानाची वेल. सापसंद.

**( रुद्राणी )**–स्त्री., वनस्पति० रुद्रजटा ( रापरि. ३.२५ )
पहा ‘ रुद्रा ’.

**–कोप**–पु., रुद्रस्य क्रोधः ( चचि. ३.१४ )
शंकराचा संताप.

**–गण**–पु., देवता० शिवगणाः येषामपचितिरपस्मारशमनी ( सुउ. ६१.२६ )
शिवगण. देवता. ज्यांची पूजा अपस्मारनाशक.

**–ज**–पु., खनिज० पारदः (रा. १३.४२ ) पारा.

**–जटा**–स्त्री., वनस्पति० तद्गुणाः– कटुः श्वासकासहृद्रोगनाशिनी, भूतरक्षोनिबर्हिणी नाम भूतराक्षसनशिनी ( रापरि. ३.२४ )
हिं.—इशरमूल.
**म.—सापसन्धि.**
गु.—रुहिमूला.
बं.—इशरमूल.
ता.—पेरुमरिन्दु.
फा.—झखन्दहिन्दी.
सापसंद. गुण–तिखट, श्वास खोकला-हृद्रोगनाशक. भूतराक्षसनाशिनी. पहा ‘ रुद्रा ’

**–पत्नी**–स्त्री., वनस्पति० अतसी (ध. ६.११४ )
अळशी.

**–पूजा**–स्त्री., शिवपूजनम् ( सुउ. ६१.२६ )
शिवाचे पूजन.

**–भाग**–पु., रोगिक्रीतस्य द्रव्यस्य मूल्याद्य एकादशांशो वणिजा वैद्याय दीयते, स रुद्रभागः इति कथ्यते ( र. ८.३ )
रोग्याने विकत घेतलेल्या औषधांच्या किंमतीचा अकरावा–एक एकादशांश भाग जो वाण्याने वैद्यांना द्यावयाचा असतो तो.

**–रेतस्**–न., खनिज० पारदः ( ध. ६.३७ ) पारा.

**–लता**–स्त्री., वनस्पति० रुद्रजटा (रापरि ३.२४ )
सापसंद. पहा ‘रुद्रा’.

**रुद्रवत्**–पु., वनस्पति० देवदारुः ( रा. १२.१०३ )
देवदार.

**रुद्रांश**–पु., एकादशभागः ( र. १२२.२४ )
अकरावा भाग. पहा ‘ रुद्रभाग ’.

**रुद्राक्ष**–पु., वनस्पति० स्वनामख्यातः (रापरि .११.१५)
अम्ल उष्णो वातघ्नः कफघ्नः रुच्यः शिरोर्तिशमनः भूतग्रहनाशनश्च ( रापरि. ११.१६ )
रुद्राक्ष. **गुण**—आंबट, उष्ण, वातनाशक, कफघ्न, रुचकर, डोकेदुखीनाशक व भूतग्रहनाशक.

**रुद्रोपमा**-वि., रुद्रसदृशम् (र. १२.१०४) शंकराप्रमाणे.

**रुधिर**–न., रक्तम् ( सुसू. १४.४४ ) रक्त.
वनस्पति० कुङ्कुमम् ( ध. ३.१२; चसू. ४.१८ )
केशर.

**–स्राव**–पु., रक्तस्य स्रवणम् ( सुनि. ११.१५-१६ )
रक्ताचा स्राव.

**रुधिरावसेचन**–न., उपक्रम० रक्तावसेचनम्
( असंसू. ३६.१८ ) रक्तस्रुति, रक्त काढणे.

**रुधिरोक्षित**–वि., रक्तप्रोक्षितः ( असंशा. १२.२३ )
रक्तप्रोक्षित, रक्त प्रोक्षण केलेला, रक्त शिंपडलेला.

**रुबु**–पु., वनस्पति० रक्तैरण्डः द्र० ' एरण्ड ' ( ध. १.२९६ ) लाल एरंड.

**रुबुक**–पु., वनस्पति० रक्तैण्डः द्र० 'एरण्ड' ( ध. १.२९६ ) लाल एरंड.

**रुरु**–पु., आनूपपशु० बहुश्रृङ्गो हरिणः (चसू. २७.३९) अयं शरदि शृङ्गत्यागी, तन्मांसगुणाः– मधुरं, कषायानुरसं, गुरु, वातपित्तोपशमनं, शुक्रविवर्धनम् ( सुसू. ४६.९९ )
हरिणविशेष. सांबर. हा शरद ऋतूंत शिंगे टाकतो, याचे मांस गोड नंतर तुरट, जड, वातपित्त शामक, शुक्रवर्धक.
पशु० रोहिणः (ध. परि. ६.३४ ) रोहिण, मृग.
**–पित्त**–न., भैषज्य० रुरुहरिणस्य पित्तम्, नेत्ररोगेषूपयुज्यते ( असंउ. १६ )
सांबराचे पित्त. डोळ्याच्या विकारात उपयोगी.

**रुषित**–न., क्रोधः ( सुचि. ४०.१३ ) संताप.

**रुहा**–स्त्री., वनस्पति० श्वेतदूर्वा ( ध. ४.१४४ ) द्र० ' दूर्वा ' पांढरी दूर्वा, पांढरी हरळी.
वनस्पति० मांसरोहिणी ( ध. ४.९४ )
एक सुगंधी द्रव्य.
समङ्गा, ( जज्जटः चचि. ३.२६७ )
मंजिष्ठा, लाजाळू.
वृक्षरुहा ( चक्र. चचि. ३.२६७ ) बांडगूळ.
**–पत्र**–न., शाक० उदग्रशाकम् (चक्र.चचि.१४.१२४) एक भाजी.

**रूक्ष**–वि., गुण० रौक्ष्यम् वीर्यसंज्ञको गुणः, स्निग्धविपरीतगुणो विशेषात् स्तम्भनः खरश्च ( सुसू. ४६.५१६ ) तैजसद्रव्यगुणो वायुगुणभूयिष्ठः श्लेष्मघ्नः, चक्षुषा ग्राह्यः ( सुसू. ४१.११ ) शोषणे शक्तिः ( हे. अहसू. १.१८ ) निर्द्रवं निःस्नेहं शोषणं च द्रव्यम् ( र.१३.१ )
रुक्ष, वीर्यसंज्ञक असा गुण. स्निग्धाच्या विपरीत गुण. स्तंभक खरखरीत. आग्नेयगुणी. वायुगुणप्रधान, कफनाशक, डोळ्याना कळणारा. शोषक कार्य. द्रवहीन, स्नेहहीन व शोषक द्रव्य.
लक्षण० यद्युक्तः अस्वेद्यो भवति ( चसू. १४.१६ )
रुक्ष गुण. रुक्ष व्यक्ति शेकण्याला अयोग्य होय.
न., वनस्पति० मरिचम् ( रा. ६.१३५-३७ ) मिरे.
पु., वनस्पति० धन्वनः ( रापरि. ९.२० ) धावडा.
मकुष्ठकः ( रा. १६.१४४ ) मठ, मटकी.
आ.को. म. १५१

**( रूक्षा )**–स्त्री., वनस्पति० दन्ती ( रा. ६.३३८) दांती.
**–गन्धक**–पु., निर्यास० गुग्गुलुः (रा. १२.१८४) गुग्गुळ.
**–च्छवि**–वि., लक्षण० अस्निग्धकान्तिः ( सुउ. ६२.८ )
स्निग्ध नसलेली कान्ति, रुक्ष कान्ति; तजेला नसलेला चेहरा.
**–ज्वर**–पु., रौक्ष्यप्रधानो ज्वरो, वातज्वर इत्यर्थः ( र. १६.६१-६४ )
रुक्षत्व ज्यात अधिक आहे असा ज्वर; वातज्वर.
**–दर्भ**–पु., वनस्पति० शरपत्रः ( रा. ८.२०९ ) दर्भ.
**–सात्म्य**–वि., रूक्षं यस्योपशेते सः (चवि.८.११८)
रूक्ष सवयीचे असणारे रूक्ष ज्याला मानवते तो.
**–स्वेद**–पु., उपक्रम० स्वेदभेदः, अस्नेहः स्वेदः ( चचि. १७.८५ ) द्र० 'स्वेद'
स्नेहाचा उपयोग न करता रूक्ष द्रव्यांनी घाम आणण्याचा प्रकार.

**रूक्षण**–वि., रौक्ष्यं खरत्वं वैशद्यं यत् कुर्यात्तद्धि रूक्षणम् ( चसू. २२.१० )
रूक्षत्व. खरखरीतपणा करून बुळबुळीतपणा नष्ट करते ते रुक्ष.
न., स्नेहविपरीतं कर्म ( चसू. १३.५३ )
स्नेहाच्या विपरीत कर्म. रूक्षण कर्म, स्निग्धाला रूक्ष करणे.

**रूक्षणात्मक**–पु., वनस्पति० करालः ( ध. ६.१०९ )
एक कुधान्य.

**रूक्षाग्नि**–वि., रूक्षगुणभूयिष्ठो वातदुष्टाग्निः ( पुरुषः ) ( चसि. २.१९ )
रूक्षगुण आधिक्य असलेला– वातानें दुष्ट अग्नि ज्याचा आहे असा पुरुष.

**रूढि**–स्त्री., रोपणम् ( अहसू. २९.६७ ) रोपण.

**रूप**–न., तैजसगुण० चक्षुरिन्द्रियग्राह्यः शुक्लादिकः ( चशा. ७.१६ ) चक्षुरिंद्रियाने ग्राह्य असे रूप.
सौन्दर्यम् ( सुसू. ५.२७ ) सौंदर्य.
लक्षणम् ( अहसू. १०.६) लक्षण, स्वरूप.
शरीरम्, आकृतिः (चशा.२.४२) शरिराची आकृति.
**–ग्रहण**–न., आकारग्रहणम् ( चशा. १.१४८-४९ )
स्वरूप प्राप्त होणे.
**–तन्मात्र**–न., पञ्चतन्मात्रेष्वेकमनुद्भूतं रूपम्, सूक्ष्मं तेजः ( सुशा. १.४ )

पाच तन्मात्रांपैकी एक तेज. तन्मात्रा, सूक्ष्म अव्यक्त तेज.

**-द्रव्य**-न., **रूपप्राक्तनकारणम्** ( चचि. २(४)४९) रूप प्राप्तीचे कारण. रूप म्हणजे शरीर ते प्राप्त होण्याचे प्राक्तन म्हणजे आरंभीचे कारण ( शुक्र ).

**-प्रतिच्छाया**-स्त्री., **रूपस्य प्रतिबिम्बम्** (चइ. ८.३) रूपाचे प्रतिबिंब.

**रूपेन्द्रिय**-न., **ज्ञानेन्द्रिय० चक्षुः, तैजसमिन्द्रियम्** ( सुशा. १.१९ ) डोळे, ज्याने रूप दिसते ते.

**रूपिका**-स्त्री., **वनस्पति० श्वेतार्कः** ( सुचि. १७.२५ ) पांढरी रुई.

**रूप्य**-न., **खनिज०रौप्यम्** ( चसि. ३.७ ) रुपे.

**-कृत्**-पु., **रौप्यस्य जारणं मारणं वा कुर्वाणः ( रजतकारकः ) तारविमलः** ( र. २.१०० ) किमयेमध्ये चांदी निर्माण करणारा रौप्यविमल नावाचा धातू.

**-कृष्टि**- स्त्री., **तारकृष्टि० पारदेन गन्धकादिभिश्च मारयित्वा बहुवारमुत्थापितं रौप्यम्** ( र. ८.९ ) चांदीचे पारा गंधक इ० नी मारण करून त्यातून चांदी पुनः काढणे अशी क्रिया अनेक वेळा करणे या क्रियेला रूप्यकृष्टि म्हणतात.

**तारकृष्टी** ( र. ८.९ ) पहा 'रूप्यकृष्टि.'

**-मल**-पु., **रौप्यमलम्** (चचि.१६.८१) चांदीचा मळ.

**-मूषा**-स्त्री., **मूषा० श्वेतवर्गेण भावितया पाषाणरहितया प्रस्तरवालुकादिवर्जितया मृत्तिकया निर्मिता मूषा** ( र. १०.१८ ) मूस. दगड, खडे, वाळू इत्यादी विरहित पांढऱ्या मातीला श्वेत वर्गातील द्रव्यांची भावना देऊन केलेली मूस.

**रूषित**-वि., **चर्चितं लिप्तम्** (चचि. ४.१०८) लिंपलेले.

**(रूषिता)**-वि.,**अवकीर्णा**(अहसू.२६.४३)चूर्ण.भुरभुरलेली.

**रेक**-पु., **उपक्रम० विरेकः विरेचनम्** ( र. २०.९२-९६ ) रेचक.

**रेखा**-स्त्री., **रत्नदोष० रेषा, राजिः** ( र. ४.३६ ) रेषा, ओळी.

**-पूर्ण**-न., **रेखाभिः पूर्णम्** (र. ८.२७) **अंगुष्ठतर्जनीभ्यां मृष्टे सति तयोः रेखान्तरे यद्विशति तद्** आंगठा व त्याच्या जवळील बोटात धरून घासले असता त्यांच्या रेषामध्ये जे शिरते ते रेखापूर्ण.

**रेचक**-पु., **वनस्पति० दन्ती** ( ध. १.२२७; पृष्ठ ५३ ) दांती.

**तिलकः** ( रा. १०.२६६; पा. २०२ ) तिळवा.

न., **खनिज० कङ्कुष्ठम्** ( ध. ३.१४१ ) कंकुष्ठ.

**रेचन**-पु., **वनस्पति० आरग्वधः** (ध. १.२१९) बाहवा.

**उपक्रम० विरेचनम्** (र. ३.१२४) उपचार. रेचक.

**( रेचनी )**-स्त्री., **वनस्पति० कालाञ्जनी** (रापरि. ४.४३; पृष्ठ ३३८ ) एक रेचक वनस्पती.

**रेचनक**-पु., **वनस्पति० कम्पिल्लकः** ( ध. ३.१३८ ) कपिला.

**रेची**-स्त्री., **वनस्पति० अङ्कोटः**(ध.१.२५८;पृ.६०)अंकोल.

**कम्पिल्लकः** ( ध. ३.१३८ ) कपिला.

**तिलकः** ( ध. ५.१५८; पृ. २०२ ) तिळवा.

**रेणु**-पु., स्त्री., **वनस्पति० रेणुका** (रा. ६.९९) रेणुकबीज.

**रेणुकबीजम्** ( सुचि. ३७.१७ ) रेणुकबीज.

**पर्पटः** ( सुचि. ३७.४० ) पित्तपापडा.

**-कदम्बक**-पु., **वनस्पति० कदम्बः** ( रा. ९.१७३ ) कदम्ब, कळंब.

**रेणुक**-न., **पुष्पविष०** ( असंउ. ४० ) रेणुक.

**वनस्पति० कङ्कुष्ठम्** ( र. ३.१२०-१२३ ) कंकुष्ठ.

**( रेणुका )**-स्त्री., **वनस्पति० हरेणुः** ( असंउ. २ )

**तद्गुणाः-कटुः शीता, मुखवैमल्यकारिका, तृष्णाविषदाहदौर्बल्यकण्डूखर्जूनाशिनी** ( ध. ३.५१ )

हिं.—संभालुक बीज, रेणुका.

**म.—रेणुकबीज.**

गु.—हरेणु.

बं.—रेणुक.

ता.—येट्टी.

रेणुकबीज. गुण-तिखट, थंड, मुख स्वच्छ करणारे, तहान-विष-दाह-दौर्बल्य-कंडू व खरूज नाहीशी करणारे.

**फलविष०** ( असंउ. ४० ) **द्र० 'विष'**

रेणुकबीज. फलविषांपैकी एक.

**रेतस्**-न., **शारीरधातु० शुक्रम्** ( चसू. १.६९ ) शुक्र.

**-(रेतो)दोष**-पु., **शुक्रदोषः** (चसू. १९.३ ) शुक्रदोष.

**-मार्ग**-पु., **शुक्रमार्गः शुक्रस्थानम्** ( चसू. २.३२ ) शुक्रमार्ग.

**-वहा**-वि., **शुक्रवाहिनी (नाडी)** (चचि. ३०.१८९ ) शुक्रवाही नाडी.

**रेतित**–वि., सूक्ष्मचूर्णितम् ( र. ५.११५ )
कानस नावाच्या शस्त्राने घासून अत्यंत सूक्ष्म केलेले चूर्ण.

**रेवत**–पु., वनस्पति० जम्बीरः ( असंचि. २४ ) ईडनिंबु. आरग्वधः ( असंचि. २४ ) बहावा.

**(रेवती)**–स्त्री., बालग्रह० ( सुउ. २७.११ )
स्त्रीविग्रहग्रहः स्त्रीजातीयदेवता (असंउ. ३) तन्नामानि –वारुणी, रेवती, ब्राह्मी, कुमारी, बहुपुत्रिका, शुष्का, षष्ठी, यमिका, धरणी, मुखमण्डिका, माता, शीतवती, कण्डूः, पूतना, निरुश्विका, रोदनी, भूतमाता, लोकमातामही, शरण्या, पुण्यकीर्तिरेतानि रेवत्या नामानि विंशतिः ( काचि बालग्रहचि ) रेवतीग्रहाविष्टबालकस्य लक्षणानि–श्यावनीलता, कर्णनासाक्षिमर्दनम्, कासो, हिध्माऽक्षिविक्षेपो, मुखवक्रता, वक्त्ररक्तत्वम्, बस्तगन्धित्वम्, शोषो, ज्वरश्च ( असंउ. ३ )
बालग्रह, स्त्रीविग्रहग्रह. स्त्रीजातीय देवता. त्यांची नावे–वारुणी, रेवती, ब्राह्मी, कुमारी, बहुपुत्रिका, शुष्का, षष्ठी, यमिका, धरणी, मुखमंडिका, माता, शीतवती, कंडू, पूतना, निरुश्विका, रोदनी, भूतमाता-लोकमातामही, शरण्या, पुण्यकीर्ति या प्रमाणे रेवतीग्रहाची वीस नावे. **त्यांची लक्षणे**– श्यावनीलता, कान नाक डोळे चोळणे, खोकला, उचकी, डोळे फिरवणे, तोंड वाकडे, तोंडावर लाली, बोकडाच्या आंगासारखा वास येणे, मुखवक्रता, वक्त्ररक्तता, बस्तगंधित्व, शोष, ज्वर.

**–कल्प**–पु., अध्यायसंज्ञा० (का संकल्प रेवतीकल्प.१) या नावाचा अध्याय.

**–प्रतिषेध**–पु., अध्यायसंज्ञा० (सुउ. ३१.१ ) या नांवाचा अध्याय.

**रैतिक**–वि., रीतिः पित्तलभेदः, तद्विकारं, तन्मयम् ( सुसू. २६.२० )
पितळाचा एक प्रकार. पितळयुक्त. पितळाचे केलेले पात्र इ०.

**रैवत**–पु., सोम० ( सुचि. २९.७ ) द्र० ' सोम '
सोमाचा एक प्रकार.
न., वनस्पति० पारेवतम् ( रा. ११.८८ )
खजूर. खारीक.

**रैवतक**–न., वनस्पति० पारेवतम् ( ध. ५.६६ )
पालेवत, खजूर, खारीक.

**रोग**–पु., रुजति इति रोगः ( असंनि. १ ) व्याधिः ( चसू. १.६ ) दुःखम्. ' एकाकारा एव रोगास्तथा रुक् सामान्यादसंख्यभेदाः । ' ( असंसू. २२ ) पर्यायाः–विकार आतङ्को गदो व्याधिराबाधा दुःखमामयो रोगः इत्यादयः ( असंनि. १ ) ' व्याधयश्च रोगशब्दं दोषप्रकृतिशब्दं विकारशब्दं च लभन्ते । ' ( चवि. ६.४ ) रोगप्रवृत्तिः ' दक्षयज्ञे वधत्रासादेवर्षीणां पलायताम् ' ' रोगाः सर्वे समुत्पन्नाः सन्तापाद्देहचेतसोः । ' ( कासंहिताकल्प० १४-१७ )
' त्रिविधं तु निमित्तमेषामसात्म्येन्द्रियार्थसंयोगः प्रज्ञापराधः परिणामश्च । ते पुनः प्रत्येकमतियोगाऽयोगमिथ्यायोगभेदास्त्रिविधा भिद्यन्ते ।– असात्म्येन्द्रियार्थसंयोगः–तत्र यथास्वं चक्षुरादीन्द्रियाणां रूपादिभिरर्थैरतिसंसर्गोऽतियोगः । अल्पशो नैव वा संसर्गस्त्वयोगः । सूक्ष्मातिदूरान्तिकस्थातिभास्वद्भैरवाप्रियविकृतादिदर्शनं द्विष्टात्युच्चपरुषभीषणादिश्रवणं पूत्यमेध्यातितीक्ष्णोग्रप्रतिकूलाद्याघ्राणं स्वभावादिभिराहारकल्पनाविशेषायतनैरपथ्यानां रसानामभ्यवहारस्तथा स्नानादीनां शीतोष्णादीनां च स्पृश्यानामयथावदुपसेवनमशुचिभूताभिघातविषवातादिसंस्पर्शश्च मिथ्यायोगः

प्रज्ञापराधः–कायवाङ्मनोभेदेन तु त्रिविधमप्यहितं कर्म प्रज्ञापराधः । तत्र कायादिकर्मणोऽतिप्रवृत्तिरतियोगः । अल्पशो नैव वा प्रवृत्तिरयोगः । वेगोदीरणधारणविषमाङ्गचेष्टनस्खलनकण्डूयनप्रभुप्रहारप्राणायामादि तथा क्षुत्पिपासाऽर्धभुक्तभाषणादि भयशोकेर्ष्यामात्सर्यादि दशविधं चाऽकुशलं कर्म यथास्वं मिथ्यायोगः ।

परिणामः–परिणामः पुनः काल उच्यते । सोऽपि शीतोष्णवर्षभेदात्त्रिधा तत्राऽतिमात्रस्वलक्षणः कालोऽतियोगः । हीनस्वलक्षणस्त्वयोगः । विपरीतो मिथ्यायोगः । ते एतेऽतियोगादयः सामान्यतोऽनुपशयलक्षणाः । सर्वो वा प्रज्ञापराध एवायं यदेषामविवर्जनम् । अर्थकर्मकालाः पुनः सम्यग्योगेनोपशयाद्भूयिष्ठं स्वास्थ्यहेतवः । तत्रापि रसवर्ज्या विषया यथायथमिन्द्रियं बाधन्तेऽनुगृह्णन्ति च शेषा रसकर्मकालास्तु सर्वं देहम् ( असंसू. २२ ) रोगाः पुनर्हेतुभेदेन द्विविधा भवन्ति–प्रत्युत्पन्नकर्मजाः

पूर्वकर्मजाश्च ( असंसू. २२ ) प्रत्युत्पन्नं कर्म परकृतमपि वर्णयन्ति तच्च पराभिसंस्कारमाचक्षते ( असंसू. २२ ) **रोगो रोगस्य हेतुः**—प्रधानमेव रोगोऽन्यस्य हेतुर्भवति, यथा ज्वरो रक्तपित्तस्य रक्तपित्तं वा ज्वरस्य तौ श्वासस्य, प्लीहा जठरस्य, तच्छ्वयथोः, अर्शांसि गुल्मोदरातिसारग्रहणीनाम् । प्रतिश्यायः कासज्वरयोः । तौ क्षयस्य । क्षयः शोषस्य ( असंसू. २२ ) **रोगभेदाः**—स रोगो द्विविधश्चोक्तः शारीरो मानसस्तथा (काखि. ३.१९) सप्तविधत्वम्–सहगर्भ–जातपीडाकालप्रभावस्वभावजाः सप्तविधाः रोगाः । तत्र सहजाः–शुक्रार्तवदोषान्वयाः कुष्ठार्शोमेहादयः पितृजाः–मातृजाश्च । गर्भजाः–जनन्यपचारात्कौब्ज्य– पाङ्गुल्य-पैङ्गल्य-किलासादयोऽन्नरसजा दौहृदविमानजाश्च । जातजाः–स्वापचारात्सन्तर्पणजाः अपतर्पणजाश्च । पीडाकृताः–क्षत–भङ्ग–प्रहार–क्रोध–शोक–भयादयः शारीरा मानसाश्च । कालजाः–शीतादिकृता ज्वरादयो व्यापन्नजा असंरक्षणजाश्च । प्रभावजाः–देव–गुरु–शाप–अथर्वणादिकृता ज्वरादयः पिशाचादयश्च । स्वभावजाः– क्षुत्पिपासा जरादयः अरक्षणजा अकालजाः ( असंसू. २२ ) 'निजागन्तुविभागेन तत्र रोगा द्विधा स्मृताः' ( असंसू. १.२० ) स्वतन्त्रा रोगाः–स्पष्टाकृतयो यथास्वं समुत्थानोपशयाश्च इतरे, परतन्त्रास्तु तद्विपरीताः, परिवाररहितोऽननुबन्धाख्यः, परिवारसहितोऽनुबन्धाख्यः, तत्राऽन्यपरिवारा व्याधयो द्विविधाः पुरोगामिनः पूर्वरूपसंज्ञाः, अनुगामिनश्चोपद्रवसंज्ञाः– ।

(असंसू. २२) समुत्थानविशेषाद्भेदाः–'द्वे रोगानीके आशयभेदेन, आमाशयसमुत्थं च पक्वाशयसमुत्थं च' (चवि. ६.३) सर्वाङ्गजा ज्वरादयः, अवयवजाः श्वित्रादयः, ऊर्ध्वाङ्गजा मुखरोगादयः ( अहसू. १९.८५ ) त्रिविधाश्च पुनर्व्याधयः मृदुमध्याऽधिकमात्राभेदेन । तत्राऽल्पलक्षणा मृदवो मध्यलक्षणा मध्याः सम्पूर्णलक्षणास्त्वधिकमात्राः' ( असंसू. २२; चक. १२.५८ ) साध्योऽसाध्य इति व्याधिर्द्विधा; तौ तु पुनर्द्विधा । सुसाध्यः कृच्छ्रसाध्यश्च याप्यो यश्चानुपक्रमः ( असंसू. २ ) साध्यरोगलक्षणम्–'सर्वौषधक्षमे देहे यूनः पुंसो जितात्मनः ! अमर्मगोऽल्पहेत्वग्ररूपरूपोऽनुपद्रवः। अतुल्यदूष्यदेशर्तुप्रकृतिः पादसम्पदि। ग्रहेष्वनुगुणेष्वेकदोषमार्गो नवः सुखः । सुखसाध्यः सुखोपायः कालेनाऽल्पेन साध्यते ॥' कृच्छ्रसाध्यलक्षणम्–'कृच्छ्रैरुपायैः कृच्छ्रस्तु महद्भिश्च चिरेण च । असाध्यलिङ्गः सङ्कीर्णस्तथा शस्त्रादिसाधनः ॥' याप्यलक्षणम्—'शेषत्वादायुषः पथ्यैर्याप्यः प्रायो-विपर्यये । दत्वाऽल्पसुखमल्पेन हेतुना स प्रतन्यते ॥ याति नाशेषतां रोगः कर्मजो नियताऽयुषः । प्रपतन्निव विष्कम्भैर्धार्यतेऽत्राऽऽतुरो हि तैः ॥' असाध्यलक्षणम्–'परोऽसाध्यः क्रियाः सर्वाः प्रत्याख्येयोऽतिवर्तते। तस्मादुपेक्ष्य एवासौ स्थितोऽत्यन्तविपर्यये ॥ भ्रममोहाऽरतिकरो दृष्टरिष्टोऽक्षनाशनः' ( असंसू. २ ) अवस्थाभेदेन साध्याऽसाध्यता–'यन्नरं सहसा रोगो दुर्बलं परिमुञ्चति। संशयप्राप्तमात्रे यो जीवितं तस्य मन्यते' ( असंशा. ११ ) 'वातव्याधिरपस्मारी कुष्ठी शोफी तथोदरी । गुल्मी च मधुमेही च राजयक्ष्मी च यो नरः । अचिकित्स्या भवन्त्येते बलमांसक्षये सति। अन्येष्वपि विकारेषु तान्भिषक् परिवर्जयेत् ॥' ( चइ. ९.८-९ ) रोगपरीक्षा– 'रोगमादौ परीक्षेत तदनन्तरमौषधम् । ततः कर्म भिषक् पश्चाद् ज्ञानपूर्वं समाचरेत् ॥' ( असंसू. २३ ) रोगज्ञानोपायः–'तत्रागमतो–रोगमेवमेवं प्रकोपनमेवं योनिमेवमात्मानमेवमधिष्ठानमेवं वेदनमेवं रूपशब्दगन्धरसस्पर्शमेवं पूर्वरूपमेवमुपद्रवमेवं वृद्धिस्थानक्षयान्वितमेवमुदर्कमेवंनामानं परीक्षेत । तस्मिन्निदं प्रतिकारस्य प्रवृत्तिरन्यथा निवृत्तिः । प्रत्यक्षतस्तु–आतुरस्य यथास्वमिन्द्रियैर्वर्णसंस्थानप्रमाणोपचयच्छायाविण्मूत्रच्छर्दिताऽऽधिक्यमन्त्रकूजनमङ्गुल्यादिसन्धिस्फुटनं देहशकृद्व्रणादिगन्धं सुप्तशीतोष्णस्तम्भसंस्पन्दनखरस्पर्शं च विद्यात् प्रकृतिविकृतिभुक्तमास्यरसं तु प्रश्नेन तथा मुच्छर्दंदुश्छर्दत्वं मृदुक्रूरकोष्ठतां स्वप्नदर्शनमभिप्रायं जन्माऽऽमयप्रवृत्तिनक्षत्रद्विष्टेष्टसुखदुःखानि च । तथा वयः प्रत्यक्षेण च । अनुमानतस्तु –यूकापसर्पणेन शरीरस्य वैरस्यम् । मक्षिकोपसर्पणेन माधुर्यम् । तथाऽग्निं जरणशक्त्या, बलं व्यायामशक्त्या, गूढलिङ्गव्याधिमुपशयाऽनुपशयतो, दोषप्रमाणमुपचारविशेषेणायुषः क्षयं रिष्टैः प्रकृतिसत्वसारसात्म्यबलान्यनुशीलनेनेति '( असंसू. २२ )

**रोगोपशमः**– पूर्वकर्मजाः कर्मक्षयादुपशाम्यन्ति, प्रत्युत्पन्नकर्मजा हेतुव्याधिविपरीतशीलनाच्छाम्यन्ति। 'सकलोऽपि चायं रोगसमूहः प्रतीकारवानायुर्वेद-विहितमुपदेशमपेक्षते। यस्मिन्नियतहेतुकोऽप्यामयः सम्यग्भिषगादेशानुष्ठानादुपात्तायुःसंस्कारापरिक्षये सद्यवेदनतां प्रतिपद्यते। अनुपक्रम्यमाणस्तु सर्व एव प्रायशो भनक्त्यकाण्डे। स्वयमपि च दैवान्नि-दानाऽल्पतया वा निवर्तमानः षोडशगुणसमुदित-क्रियोपलम्भादाशु अपरिक्लिष्टस्य चाऽपगच्छति। अनियतफलदायिनि तु दैवे हिताभ्यासरतस्याव-काशमेव न लभते व्याधिः। तस्मान्न कस्याञ्चिदव-स्थायामात्मवान् हिताहितयोस्तुल्यदर्शी स्यात् (असंसू. २२) **अपुनर्भवोपायः**– 'निवृत्तोऽपि पुनर्व्याधिरल्पेनायाति हेतुना। देहे मार्गीकृते दोष-शेषः सूक्ष्म इवानलः॥ तस्मात्तमनुबध्नीयात्प्रयोगे-णानपायिना। सिद्धानामपि योगानां पूर्वेषां दार्ढ्य-मावहन्॥' (असंसू. २३)

रुजति म्हणजे पीडा करतो तो रोग. रोग असंख्य असले तरी सर्वांत पीडा हा एक सर्वसामान्य धर्म असल्यामुळे एका वर्गाचे ते होत. पर्याय–विकार आमय इ० वर दिलेले. दोष प्रकृति ही त्याला म्हणतात. रोगनिर्मिति– दक्षयज्ञातही आपला वध होईल या भीतीने देव ऋषी पळत असतां झालेल्या त्यांच्या शरीर व मन संतापाने सर्व रोग उत्पन्न झाले. **कारणे**– प्रकार ३. (१) असात्म्येंद्रियार्थ संयोग (२) प्रज्ञापराध व (३) परिणाम. ती कारणे पुन्हा अतियोग, अयोग, मिथ्या योग या तीन प्रकारची होतात. (१) असात्म्येंद्रियार्थ संयोग म्हणजे **आत्मसात न होऊ शकणारा इंद्रिय व अर्थ यांचा संयोग.** उ०— डोळ्याचा रूप इत्यादींशी अतिशय संसर्ग होणे. हा अतियोग; थोडा थोडा किंवा अभावाने संसर्ग होणे हा अयोग व सूक्ष्म, अतिदूर, अतिजवळ अति तेजस्वी भयंकर न आवडणारे वेडेवाकडे दृश्य दिसणे हा डोळ्याचा मिथ्यायोग. त्रासदायक व तिटकारा वाटणारे, कठोर भीतिदायक शब्द ऐकणे हा श्रवणेंद्रियाचा मिथ्या-योग घाणेरडे, अपवित्र, अतितीक्ष्ण अतिउग्र व न आवडणारे वास घेणे हा घ्राणेंद्रियाचा मिथ्यायोग स्वाभाविक दृष्टीने अपथ्यकारक असे आहाराचे निरनिराळे पदार्थ खाणे, अपवित्र जागी खाणे, हा रसनेंद्रियाचा मिथ्यायोग होय. स्नान इ० व थंड उष्ण पदार्थांचा अयोग्य प्रकाराने होणारा स्पर्श, तसा अपवित्र भूतांचे आक्रमण असलेला व विषसंसर्ग असलेल्या वायूचा, वस्त्र इ० चा स्पर्श हा त्वग् इंद्रियाचा मिथ्यायोग होय. **प्रज्ञापराध**–काया, वाचा मन या तिघांचे तीन तीन प्रकारचे अहितकारक कर्म म्हणजे प्रज्ञापराध होय. त्यात शरिरादिकांची अतिप्रवृत्ति हा अतियोग अल्पप्रवृत्ति किंवा मुळीच प्रवृत्ति न होणे हा अयोग होय. मळमूत्रादिकांचे वेग धारण करणे किंवा मुद्दाम निर्माण करणे, विषम अशी शरिरावयवांची हालचाल, वेडेवाकडे पडणे, खाजवणे, आघात, प्राणायाम इत्यादी तसेच भूक, तहान, अर्धे जेवण नंतर भाषणादि कर्मे करणे; भीति, शोक, ईर्ष्या, मत्सर इत्यादी दहा प्रकारचे पापकर्म हीं त्या त्या शारीर घटकाची मिथ्या योगाची उदाहरणे होत. **परिणाम**—परिणाम म्हणजे काल. तो थंड उष्ण व पावसाळा असा तीन प्रकारचा. त्या त्या काळी स्वतःचे जे उष्ण, थंड असे लक्षण, त्या लक्षणाची तीव्रता–अतिशयत्व तो अतियोग, तेच स्वतःचे लक्षण कमी असणे–थंडीच्या दिवसात थंडी कमी असणे किंवा नसणे अयोग. व थंडीच्या दिवसात गरमी असणे किंवा पाऊस पडणे असे विपरीत असणे मिथ्यायोग, हे अतियोगादि सामान्यतः अनुपशयी म्हणजे अनारोग्यकर किंवा आत्मसात न होणारे असतात. यांचा त्याग न करणे हा सुद्धा एक प्रज्ञापराधच होय. कालार्थ कर्मांचा स्वास्थ्याला गरजेइतका योग होणे हा स्वास्थ्याचे कारण होय. तो आत्मसात होतोही. त्यांतही रसाखेरीज इतर शब्दस्पर्शादिकांचा हीनमिथ्यातियोग त्या त्या इंद्रियांना बाधक होतो व समयोग उपकारक होतो. पण रसविषयक हीनमिथ्यादि योग व कर्म काल यांचे हीनमिथ्यातियोग सर्व शरिराला बाधक होतात व त्यांचा सम योग आरोग्यकर होतो, कारणभिन्नत्वाने रोग दोन प्रकारचे. या आयुष्यांतील कर्माचे तत्काल फलस्वरूप व पूर्वकर्माने होणारे. तात्कालिक कर्मरूपी कारण दुसऱ्या कडून ही घडते त्याला पराभिसंस्कार म्हणतात. रोग हा रोगाचे कारण होतो. जसे ज्वर हा रक्तपित्ताचे कारण होतो. येथे ज्वर हा प्रधान आहे. किंवा रक्तपित्ताने ज्वर होणे. ते दोघे

रोग श्वासाचे कारण होतात. प्लीहा उदराचे, उदर सुजेचे, मूळव्याध, गुल्म व उदर, अतिसार ग्रहणी यांचे. पडसे ज्वर, खोकला यांचे व ते क्षयाचे, क्षय शोषाचे कारण होतो. **रोगाचे प्रकार**- दोन; शारिरिक व मानसिक. आणखी ७ प्रकार (१) **सहज**- शुक्र व आर्तव यांच्या दोषामुळे होणारे कुष्ठ, मूळव्याध, प्रमेह इत्यादि आणि पित्याकडून व मातेकडून झालेले. (२) **गर्भज**- मातेच्या अपथ्यामुळे कुबड, पांगळेपणा, पिंगटपणा, कोड इत्यादि. अपथ्य २ कारणाने संभवते. अपथ्य आहार इ० ने व डोहोळे पुरविले न गेल्याने. (३) **जातज**- स्वतःच्या अपचाराने होणारे. हे २ प्रकारचे. पौष्टिक व अधिक अन्नादिकांच्या योगाने आणि कृशता निर्माण करणाऱ्या निकस अन्नादि व लंघन अतिश्रम इत्यादिकांनी होणारे. (४) **पीडा कृत**-आघात, जखम, भंग, क्रोध, शोक, भय, यांनी होणारे. शारिरिक व मानसिक. (५) **कालज**- थंडी, उष्णता इत्यादींमुळे झालेला ज्वर इत्यादीं तसेच संरक्षण बरोबर न करता आल्याने किंवा काल विकृत झाल्यामुळे होणारे. (६) **प्रभावज**-देव, गुरु इ० चे शाप व अथर्ववेदात सांगितलेल्या जारण मारणाने झालेले ज्वर इ० व पिशाच राक्षस बाधा इत्यादी. (७) **स्वभावज**- भूक, तहान, म्हातारपणही रक्षण न केल्यामुळे किंवा अकाली त्यांचा उद्भव झाल्याने, रोगाचे पुन्हा दोन प्रकार- शरिरांतील दोषांनी झालेले ते निज व बाह्य कारणाने झालेले आगंतु. **स्वतंत्र रोग**- स्पष्ट स्वरूप असलेले स्वतःच्या कारणाने झालेले व स्वतःच्या उपचारांनी शमणारे; **परतंत्र रोग**- याच्या विपरीत अस्पष्ट स्वरूपाचा स्वतःच्या कारणाने न झालेला व तो ज्यामुळे उत्पन्न झाला आहे त्या रोगाच्या उपचाराने शमणारा. पुनः दोन प्रकार— परिवार सहित अनुबंधी.(परिवाररोग पूर्वरूपे व उपद्रव) उपद्रव हा अनुगामी व पूर्वरूप पुरोगामी होय. परिवाररहित अननुबंधी, ज्वर इत्यादी रोग. **स्थान भेदाने**—आमाशयजन्य व पक्वाशयजन्य. सर्वांगज ज्वरादी व अवयवज कोड इत्यादी. ऊर्ध्वांगज मुख-रोगादी. पुन्हां तीन प्रकार. मृदु, मध्य व अधिक; थोडी लक्षणे असलेला मृदु. मध्यम लक्षणाचा मध्यम व संपूर्ण लक्षणांचा अधिक. साध्य व असाध्य असे २ प्रकार. साध्यात प्रकार दोन; सुसाध्य व कष्टाने साध्य. असाध्य प्रकार—याप्य व उपचार न करता येण्या-सारखे. **साध्यलक्षण**—कोणतेही औषध सहन करणारे शरीर असलेला, तरुण पुरुष, मन ताब्यात असणारा, हृदय इत्यादी मर्मस्थानात रोग न झालेला, ज्याची कारणे पूर्वरूपे रुपे अल्पप्रमाणात आहेत. उपद्रव नसलेला, विकार करणाऱ्या दोषाशी समान गुणाचा धातु इ० दूष्ये, देश ऋतु प्रकृति नसेल तर, उप-चाराचे रोगी, वैद्य, औषध, परिचारक ही आपापल्या ४।४ गुणांनी अशी सोळा ही गुणरूपी पायांनी मजबूत असतील, ग्रह अनुकूल असतील, रोगकर, दोष एक व एकमार्गांत असला व रोग नवा असला तर तो सुखसाध्य असतो; सुखसाध्य विकार साध्या उपचारांनीं व थोड्या अवधीत साध्य होतो, **कष्टसाध्य लक्षण**—मोठ्या कष्टकारक उपायांनी व दीर्घकाळाने साध्य होणारा, असाध्य चिन्हे दिसणारा व दुसऱ्या विकाराच्या लक्षणाचा गुंतागुंत असलेला व शस्त्रादिकांवाचून साध्य न होणारा.

**याप्यलक्षण**—आयुष्य शिल्लक आहे तो पर्यंत रहाणारा व पथ्यसेवनाने शांत रहाणारा. वरील लक्षणाच्या विपरीत लक्षणे असतांना थोडे बरे वाटले तरी थोड्याशा कारणाने रोग वाढतो. कर्मज रोगही याप्यच होय; कारण निश्चित आयुष्य असे पर्यंत रोग निःशेष होत नाही. तो केवळ हितकर—पथ्याचा उपचाराने पडणारे घर एका खांबाने जसे सावरून धरलेले असते तसे ते शरीर सावरून जगवीत असतो.

असाध्य लक्षण— वरील साध्य लक्षणांच्या अति-विपरीत लक्षणे असली की तो असाध्य असतो. त्याची उपेक्षा करावी, फार तर तो बरा होणार नाही असे सांगून चिकित्सा करावी. भ्रम, विचार विभ्रम, बेचैनी, असलेला इंद्रियांचा नाश झालेला व मरणदर्शक चिन्हे असलेला रोगी त्याज्य होय. **अवस्थानुरूप साध्यासाध्यता**— ज्या दुर्बळ रोग्याचा रोग एकदम नाहीसा होतो त्याच्या जीविताबद्दल संशयी असावे. वातव्याधि, अपस्मार, कुष्ठ, सूज, उदर, गुल्म, मधुमेह, क्षय, यांचा बल मांस क्षय झाला तर चिकित्सा करूं नये. दुसऱ्या रोगांतही असेच सम-जावे. **रोगपरिक्षा**—अगोदर रोगाची परीक्षा नंतर औषधाची परीक्षा करावी नंतर ज्ञानपूर्वक उपचारांना आरंभ करावा. **रोगज्ञानाचे उपाय**- शास्त्रावरून

प्रथम रोगांचे स्वरूप समजून घ्यावे, त्याची प्रकोपक व मूळ कारणे, त्याची प्रकृति व त्याचे अधिष्ठान, वेदना, रूप, शब्द, गंध, रस, स्पर्श, पूर्वरूप, उपद्रव, वृद्धि, स्थान, क्षय, साम्य, परिणाम व त्याचे नाव असे असे आहे हे निश्चित करावे. त्याचा प्रतिकार करण्याची शरीरप्रवृत्ति या प्रकारची आहे, निवृत्ति अन्य प्रकारची आहे हे समजावून घ्यावे. **प्रत्यक्षतः**— रोग्याचा वर्ण, आकार, अवयव, प्रमाण, पुष्टि, छाया, विष्टा मूत्र, ओकारी, यांचे आधिक्य आतड्यातील आवाज अंगुली इत्यादिकाच्या संधीचे कटकट आवाज, शरीर, मळ, व्रण इत्यादिकांचे वास, सुप्तता, उष्णता, थंडावा, ताठरपणा, स्फुरण, त्वचेचे बाधिर्य, खरखरीत स्पर्श इत्यादिकाचे स्वतः इद्रियांनी प्रत्यक्ष ज्ञान करून घ्यावे. प्रकृति, विकृति, आहार, तोंडाचा रस हे प्रश्नाने जाणावे. तसेच ओकारी चटकन होऊ शकते की त्रास होतो, कोठा हलका की भारी, स्वप्ने कोणती पडतात; काय वाटते, जन्मतः रोग, जन्म नक्षत्र, इच्छा, द्वेष, तसेच कशाने बरे वाटते, कशाने त्रास होतो, वय हे सर्व प्रश्नाने व प्रत्यक्ष जाणून घ्यावे. **अनुमानाने**— उवा झाल्यास शरिराची विरसता, माशा अंगावर जास्त बसू लागल्यास माधुर्य, पचनशक्तीवरून अग्नि, व्यायामशक्तीवरून बळ, ज्याची चिन्हे अव्यक्त आहेत त्याची परीक्षा कशाने बरे वाटते, कशाने बिघडते यावरून, उपचारांच्या वैशिष्ट्यांवरून दोषांचे प्रमाण, रिष्टमरणदर्शक चिन्हांवरून आयुष्याचा क्षय, प्रकृति व मन, सारासारत्व, सात्म्यासात्म्य बल म्हणजे सहनशक्ति ही त्याच्या सततच्या अभ्यासावरून समजावीत.

**रोगशमन**—पूर्वकर्मज रोग कर्मक्षयाने शमतात व या आयुष्यात केलेल्या कर्मांने झालेले रोग यांच्या विपरीत गुणकर्मांच्या सेवनाने शमतात. हा सर्व साध्य रोगसमूह आयुर्वेदोक्त प्रतीकारक उपचारांच्या ज्ञानाची अपेक्षा करितो. ज्यांत निश्चित कारणे समजली तो रोगी वैद्याच्या सांगण्याप्रमाणे व्यवस्थित वागला तर, आयुष्य असल्यास व उपचाराचे संस्कार सतत होत राहिल्यास रोगाच्या वेदना सहन करू शकतो. ज्याची चिकित्साच करता येण्यासारखी नाही असा प्रत्येक रोगी अकाली मरतो. स्वतः दैवाने किंवा थोड्याशा कारणाने परतला तर सर्व सोळाही आधारभूत घटक असलेली संपन्न चिकित्सा केल्यास तावडतोब क्लेश न होता बरा होतो परंतु अनिश्चित फल देणारे दैव असतांना नेहमी हितसेवन करणाऱ्या व्यक्तीत रोगाला थारा मिळत नाही; म्हणून कोणत्याही अवस्थेत मनोनिग्रही मनुष्याने जागृत राहून हित व अहित ही दोन्ही सारखीच समजू नयेत. **रोग पुन्हा होऊ नये म्हणून उपाय**—बरा झालेला रोगही थोड्याशा कारणाने पुन्हा होतो. शरिरात स्रोतसात शिल्लक दोष लहानशा अग्निकणासारखा असतो. म्हणून अपाय न करणाऱ्या सिद्ध अशा रसायन योगांचे सेवन करून शरीर बळकट करावे व मिळालेले आरोग्य कायम ठेवावे.

दोषः, ' रोगशब्दो दोषेषु वर्तते
( ड. सुचि. १३.१६; चवि. ६.४ ) दोष.
**यक्ष्मा** ( चचि. ८.११ ) यक्ष्मा, क्षयरोग.
**ज्वरः** ( चक्र. चचि. ३.११ ) ज्वर.
**वनस्पति० कुष्टम्** ( ध. ३.४९ ) कोष्ट.

**–ग्राम**–पु., **ग्रामः समूहः, तेन रोगग्रामो रोगसमूहः** ( असंनि. १ )

रोगाचा समुदाय, गट.

**–तत्त्व**–न., **रोगस्य निश्चितं स्वरूपम्** ( चवि. ४.७ )
रोगाचे निश्चित स्वरूप.

**–दर्शन**–न., **रोगस्य प्रत्यक्षपरीक्षा, यथा रोगा अर्शः-प्रभृतयः, तेषां दर्शनं नाडीयन्त्रेण कर्तव्यम्** ( सुसू. ७.१३ )

रोगाची प्रत्यक्ष परीक्षा जसे मूळव्याधीचे परीक्षण नाडीयंत्राने करणे.

**–नुद्भेषज**–न., **रोगनुन्नाम रोगहरं, तादृशं भेषजम्** ( चचि. १.४ )

रोगनाशक औषध.

**–परीक्षा**–स्त्री., **रोगस्य परीक्षणम्, रोगस्य प्रमाणैर्ज्ञानं विनिश्चयो वा। सा परीक्षा प्रत्येकरोगविशेषज्ञानार्थम् इष्यते रोगविज्ञानोपायाः पञ्च–तेच निदानं पूर्वरूपं रूपमुपशयः सम्प्राप्तिश्च। तत्र निदानं रोगोत्पादको हेतुः, सोऽपि द्विविधः–आसन्न विप्रकृष्ट भेदात्। तत्रासन्नो हेतुः कुपिता वातादयः, विप्रकृष्टहेतुर्दोषप्रकोपकरमाऽऽहारविहारादि। उत्पित्सुरामयो येन रूपेण लक्ष्यते, तत्पूर्वरूपम्, यथाऽऽलस्यादि ज्वरस्य पूर्वरूपम्, व्याधीनामव्यक्तं**

लक्षणमपि पूर्वरूपम् । पूर्वरूपमेव व्यक्ततां यातं रूपमित्यभिधीयते रूप्यते निरूप्यते सम्यक् ज्ञाप्यते अनेनेति रूपम् लक्षणमिति यावत्, रूपावस्थायां वातादिदोषाणां रोगाणां च लक्षणानि सुव्यक्तानि भवन्ति । औषधान्नविहाराणां सुखावह उपयोग उपशयः, स हि व्याधेः, सात्म्यमिति स्मृतः । विपरीतोऽनुपशयो व्याध्यसात्म्यऽऽभिसंज्ञितः । सम्प्राप्तिस्तु रोगस्योत्पत्तिगरातिर्वा यथा दुष्टेन दोषेण देहे चानुविसर्पता येन प्रकारेणाऽऽमयस्य निर्वृत्तिः स प्रकारः । निदानादीनां पञ्चानां रोगविनिश्चये हेतुत्वम् । निदानादयः पञ्च व्यस्ताः समस्ता वा व्याधिबोधका भवन्ति ( अहनि. १.२-८ )

रोगाचे परीक्षण; रोग निश्चित करणे. प्रत्येक रोगाच्या बावतीत परीक्षण अवश्य असते. रोग समजून घेण्याचे उपाय पाच (१) निदान (२) पूर्वरूप (३) रूप (४) उपशय (५) संप्राप्ति. निदान म्हणजे रोग उत्पन्न करणारे कारण, ते दोन प्रकारचे (१) **संनिकृष्ट कारण**–प्रकुपित झालेले वातादि दोष (२) **विप्रकृष्ट कारण**– दोषांचा प्रकोप करणारे अयोग्य आहार-विहार. **पूर्व रूप**– म्हणजे रोग होण्यापूर्वीची चिन्हे. किंवा रोगाचे अव्यक्तरूप; ज्यावरून पुढे होणारा विकार ओळखता येतो. असे लक्षण. जसे आळस हे ज्वराचे पूर्वरूप. अस्पष्ट चिन्ह हे सुद्धा रोगाचे पूर्वरूप संभवते. **रूप**– म्हणजे रोगाचे चिन्ह; वातादि दोषांची शरिराला होणारी त्रासदायक स्वरूपाची स्पष्ट चिन्हे. पूर्वरूपांची स्पष्ट अवस्था. **उपशय**– म्हणजे ज्यावेळी गुंतागुंतीची रोग चिन्हे असतात त्या वेळी व्याधीचे रूप ओळखण्यासाठी जो औषध-अन्न-विहार यांचा उपयोग केला जातो व जो उपयोग उपयोगी पडला असे समजते तो, उपशय. त्यालाच **सात्म्य** असे ही नाव आहे. याच्या उलट **संप्राप्ति**– म्हणजे शरिरांत रोगाचा प्रादुर्भाव निर्माण करणारे दोष कसे किंवा व्याध्यसात्म्य, स्थिति म्हणजे अनुपशय प्रकुपित झाले, कसे पसरले कसे अमुकच रोग निर्माण करते झाले यांचे यथार्थ ज्ञान ही निदानादि पाच ही किंवा एक एक ही साधन रोग ओळखण्याला उपयोगी असते.

**–प्रकृति**–स्त्री., **रोगकारणम्** ( चसू. २८.७ )
रोगाचे कारण.
**रोगस्वभावः** ( कासू. २७.४ ) रोगाचा स्वभाव.

**–प्रकोपण**–न., **रोगाणां प्रकोपकत्वेन कारणम्** ( असंसू. १० )
रोगप्रकोपणाचे कारण.
**दोषप्रकोपहेतुः, यथा अभिष्यन्दिविष्टम्भिविदाहिहिमगुरुरूक्षणं किलाटदधिकूर्चीकामत्स्यशुष्काऽऽममूलकं क्षारपिष्टं विरूढाद्यं न शीलयेत् समस्तम्** ( असंसू. १० )
दोषाचा प्रकोप होण्याची कारणे–शरिरात आर्द्रता अधिक निर्माण करणारे अवष्टंभक, आंबट, जळजळ करणारे, थंड, जड, रूक्ष, दही व त्याचे पदार्थ, मासे, सुकलेले, कच्चे मुळे, क्षार, पिठूळ मोड आलेले धान्य सेवन करू नये.

**–प्रभाव**–पु., **रोगशक्तिः** ( असंसू. २२ )
रोगाची शक्ति.

**–भिषग्जितीय**–वि., **रोगभिषग्जितमधिकृत्य कृतं ( विमानम् ) अध्यायः संज्ञाविशेषः** ( चवि. ८.१ )
चरक विमान स्थानात या नावाचा अध्याय. यात रोगचिकित्सेसंबंधी विचार आहेत.

**–मार्ग**–पु., **रोगस्थानम्** ( चसू. ११.४८ ) '**त्रयश्च रोगाणां मार्गा बाह्यमध्याऽऽभ्यन्तराः । तत्र बाह्यो रक्तादिधातवस्त्वक्, स पुनः शाखाख्यः । तदाश्रया गण्डपिटकालज्यपचीचर्मकीलार्बुदाऽदिमांसमषव्यङ्गादयो,बहिर्भागाश्च शोथाऽर्शोगुल्मविसर्पविद्रध्यादयः। मध्यो मूर्धहृदयबस्त्यादीनि मर्माण्यस्थिसन्धयः। तत्रोपनिबद्धाश्च स्नायुसिराकण्डरादयः । तदाश्रयाः पक्षवधग्रहाऽपतानकार्दितराजयक्ष्मास्थिसन्धिशूलगुदभ्रंशादयो मूर्धादिरोगाश्च । आभ्यन्तरो महास्रोतः शरीरमध्यं महानिम्नमामपक्वाशयाश्रयः कोष्ठोऽन्तरिति पर्यायाः । तदाश्रया ज्वरातिसारच्छर्द्यलसकविसूचिकाकासश्वासहिक्काऽऽध्मानोदरप्लीहादयोऽन्तर्भागाश्च शोफार्शोविद्रधिगुल्मादयः।**' (असंसू. २२)
रोगांची स्थाने; रोगांचे मार्ग तीन—(१) बाह्य (२) मध्य (३) अभ्यन्तर. **बाह्य रोगमार्ग**—रक्तादि सहा धातु आणि त्वचा व शाखा ह्या रोगमार्गात गंड, पिटका, अलजी, अपची, चमकील; अर्बुद, अधिमांस, मष, व्यंग, शोथ, अर्श, गुल्म, विसर्प, विद्रधि इत्यादी रोग होतात.

**मध्यरोगमार्ग**—मूर्ध (डोके) हृदय, बस्ति, मर्मे, अस्थि आणि संधि.
त्यांच्याशी निगडित स्नायु, सिरा, कण्डरादिक मध्य-

रोग मार्गात–पक्षवध, पक्षग्रह, अपतानक अर्दित, राजयक्ष्मा, अस्थिसंधिशूल, गुदभ्रंश, ऊर्ध्वजत्रुविकार इत्यादी रोग होतात. **अभ्यन्तररोगमार्ग**-महास्रोतस, शरीरमध्य महानिम्न आमाशयाश्रय, पक्वाशयाश्रय आणि कोष्ठ व अंतर अशी ह्या मध्यमार्गांची पर्यायनावे आहेत. अभ्यंतर रोग मार्गात ज्वर, अतिसार, ओकारी, अलसक, विसूचिका, कास, श्वास, हिक्का, आध्मान, उदर, प्लीहेचे रोग आंतल्या भागांतील अर्श, विद्रधि, गुल्म इ. रोग होतात.

**–राज्**–पु., **रोग० राजयक्ष्मा रोगेषु प्रधानत्वेन राजते शोभते इति रोगराट्** ( असंनि. ५ ) क्षय.

**–राज**–पु., **रोग० राजयक्ष्मा** ( चचि. ८.३२; असंचि. ७ )
क्षय.

**–विनिश्चय**–पु., **रोगाणां निश्चितं ज्ञानम्** ( मानि. )
रोगाचे निश्चित ज्ञान.
**माधवकृतरोगविज्ञानग्रन्थस्य नाम** ( मानि. पञ्चनिदान. २ )
माधवाचार्यांने लिहिलेल्या रोगविज्ञान पुस्तकाचे नाव.

**–विशेषविज्ञान**–न., **रोगज्ञानार्थमाप्तोपदेशादि-प्रमाणम्** ( चवि. ४.३ )
रोगनिश्चयासाठी आप्तोपदेशादी निरनिराळी प्रमाणे.

**–वृत्ति**–वि., **रोगी** ( सुसू. २०.९ ) रोगी.

**–व्रज**–पु., **व्रजः समूहः, रोगसमूहः** ( र. ५.२३ )
रोगसमूह, रोगांचे आगर.

**–शिला**–स्त्री., **खनिज० मनःशिला** ( रा. १३.१५८ )
मनशीळ.

**–सङ्घ**–पु., **रोगसमूहः** ( चचि. १३.९ )
रोगसमूह; बरेच रोग एकत्र असणे.

**–समुत्थान**–न., **रोगाणां हेतुः, समुत्तिष्ठति प्रादुर्भवति अस्मात् इति समुत्थानं हेतुः कारणं वा** ( चसू. २८.४४; असंसू. ९ )
रोगांचे कारण. ज्यापासून रोग उत्पन्न होतो असे कारण.

**–सात्म्य**–न., **रोगस्योपशयः, यथा गुल्मिनां क्षीरमुदावर्तिनां घृतं प्रमेहिणां क्षौद्रमिति** ( ड. सुसू. ३५.३९ )
रोगाचा उपशय; ज्याच्या योगाने रोग कमी होईल ते द्रव्य, क्रिया, उपचार. जसे गुल्माला दूध, उदावर्ताला तूप, प्रमेहाला मध इ०.



**–साधन**–न., **व्याधिभेषजम् साध्यते अवजीयते अनेनेति साधनमत्र भेषजम्** ( सुउ. १.८ )
रोगाचे औषध.

**रोगाधिकरण**–न., **रोगस्याधिकरणम् संश्रयत्वेन स्थानम्** ( चसू. १९.३ )
रोगाचे स्थान, आश्रय.

**रोगाधिकार**–पु., **रोगं समुद्दिश्यकृतोऽध्यायः, चरकसूत्रस्थानस्याष्टोदरीयाख्य एकोनविंशोऽध्यायः** ( चसू. १९ )
अध्यायाचे नाव. रोगाची नावे यात आहे.

**रोगाधीश्वर**–पु., **रोग० राजयक्ष्मा** ( र. १७.१३९ )
क्षय. रोगराज.

**रोगानीक**–न., **अनीकं समूहः, रोगसमूहः, प्रभाव–बलाधिष्ठान–निमित्ताऽऽशयभेदाच्च, प्रत्येकं द्वे इति च दश रोगानीकानि । प्रभावभेदात्साध्यमसाध्यम् बलभेदान्मृदु दारुणं च, अधिष्ठानभेदान्मनोऽधिष्ठानं शरीराऽधिष्ठानं च, निमित्तभेदाच्च स्वधातुवैषम्यमागन्तु च, आशयभेदादामाशयपक्वाशयसमुत्थम्** ( चवि. ६.३ )
रोगांचा समूह; अनीक म्हणजे समूह. प्रभाव, बल, आश्रय, कारण, आशय, भेदाने प्रत्येकी दोन. असे दहा प्रकार. प्रभावाने साध्य व असाध्य. बलाने– सौम्य, तीव्र. आश्रयाने मानस व शारीर. कारणाने– आगन्तु व धातु वैषम्यात्मक. आशयाने–आमाशयोत्थ व पक्वाशयोत्थ.

**रोगानीकराज्**–वि., **रोग० रोगसमूहस्य राजा, ज्वरः** ( सुउ. ३९.८ )
ताप. रोगगणराज.

**रोगानुत्पादनीय**–वि., **अध्यायसंज्ञा० रोगानुत्पादनमधिकृत्य कृतः ( अध्यायविशेषः )** ( अहृसू. ४.१; असंसू. ५ )
या नावाचा अध्याय. यात रोग उत्पन्न न होण्याच्या दृष्टीने उपाय सांगितले आहेत.

**रोगानुबन्ध**–पु., **रोगस्य अनुगामित्वेन संबन्धः** ( असंसू. २२ )
एक रोग झाल्यावर होणाऱ्या रोगाचा संबंध.

**रोगाभिसर**–पु., **रोगाणाम् अभिसरः आनेता कुलक्षणयुक्तो वैद्यः** ( चसू. २९.५; चसू. २९.९ )
रोग उत्पन्न करणारा वैद्य; वैद्यत्वाच्या लक्षणाच्या विपरीत लक्षणे असलेला वैद्य, रोगसहाय्यक.

**रोगाश्रय**-वि., रोगसंश्रितः, रोगानुबन्धी ( उपद्रवः ) ( चचि. २१.४० )

रोगाचा आश्रयी, अनुबंधी; रोगाचा उपद्रव.

**रोगिन्**-पु., ज्वरादिरोगोऽस्यास्ति इति यद्वा रुजति ज्वरादिना पीडामनुभवति इति रोगी (अहसू. १.२२) रोगोपहतशरीरः ( अहसू. १.२२ ) आतुरः, पादचतुष्टये एकः ( अहसू. १.२७ ) आतुरस्य चतुर्गुणाः-'आढ्यो रोगी भिषग्वश्यो ज्ञापकः सत्ववानपि।' ( अहसू. १.२९ ) धनवान्वैद्यवश्यो रोगाऽऽहारविहारादीनामन्वयव्यतिरेकं बोधयितुं समर्थोऽभीरुश्च ( असंसू. २ ) अचिकित्स्य आतुरः-अनपवादप्रतीकारोऽधनोऽपरिचारको वैद्यमानी चण्डोऽसूयकस्तीव्राधर्मरुचिरतिक्षीणबलमांसशोणितोऽसाध्यरोगोपहतो मुमूर्षुलिङ्गान्वितः ( चवि. ३.४५ )

रोगी. रोगांनी पछाडलेल्या शरिराच्या उपचारांच्या चार साधनीभूत पायांपैकी एक. याचे चार **गुण**—रोगी- ( १ ) धनवान ( २ ) वैद्यांच्या सांगण्याप्रमाणे वागणारा, ( ३ ) रोग व त्याचेवर आहारादिकांचे सेवनासेवनाचे इष्टानिष्ट परिणाम स्पष्ट सांगणारा ( ४ ) निर्भय असा असावा. उपचारास अयोग्य रोगी-योग्य सांगितले तर त्यास विरोध करणारा निर्धन, परिचारक नसलेला, आपण वैद्य आहोत असे मानणारा, रागीट, मत्सरी, अधर्माबद्दल तीव्र आवड असलेला, अतिक्षीण-बल-मांस-रक्त असलेला, असाध्य रोगाने जर्जर, व मरणदर्शक चिन्हे असणारा.

**( रोगि )-त्व**-न., रुग्णभावः ( असंसू. ९ )

रोगीपण, आजारीपण.

**-परीक्षा**-स्त्री., रोगस्य ज्ञानार्थमातुरस्य परीक्षा। परीक्ष्यभावाः-इह खलु वर्णश्च स्वरश्च गन्धश्च रसश्च स्पर्शश्च श्रोत्रं च घ्राणं च रसनं च स्पर्शनं च सत्वं च भक्तिश्च शौचं च शीलं चाचारश्च स्मृतिश्चाऽऽकृतिश्च प्रकृतिश्च विकृतिश्च बलं च ग्लानिश्च मेधा च हर्षश्च रौक्ष्यं च स्नेहश्च तन्द्रा चारम्भश्च गौरवं च लाघवं च गुणाश्चाहारश्च विहारश्चाहारपरिणामश्चोपायश्चाऽपायश्च व्याधिश्च व्याधिपूर्वरूपं च वेदनाश्चोपद्रवाश्च च्छाया च प्रतिच्छाया च स्वप्नदर्शनं दूताधिकारश्च पथि चौत्पातिकमातुरकुले भावावस्थान्तराणि च भेषजसंवृत्तिश्च भेषजविकारयुक्तिश्चेति परीक्ष्याणि प्रत्यक्षानुमानोपदेशैरायुषः प्रमाणावशेषं जिज्ञासमानेन भिषजा। तत्र तु खल्वेषां परीक्ष्याणां कानिचित् पुरुषमनाश्रितानि कानिचिच्च पुरुषसंश्रयाणि। तत्र यानि पुरुषमनाश्रितानि, तानि उपदेशतो युक्तितश्च परीक्षेत। पुरुषसंश्रयाणि पुनः प्रकृतितो विकृतितश्च ( चइ. १.३-४ ) आतुरदेहस्थितानां भावानां परीक्षणं संक्षेपतः दर्शनस्पर्शनप्रश्नैः कुर्यात् ( अहसू. १.२२ ) विस्तरतो रोगाणां विज्ञानोपायाः षड्विधाः पञ्चभिः श्रोत्रादिभिः प्रश्नेन च। पञ्चभिः श्रोत्रादिभिरातुरशरीरगतान्सर्वानिन्द्रियार्थान्परीक्षेत। तद्यथा-शब्दविशेषाः-अन्त्रकूजनम् अङ्गुलिपर्वणां च सन्धिस्फुटनं स्वरविशेषांश्च, ये चान्येऽपि केचिच्छरीरोपगताः शब्दाः स्युः, तान् श्रोत्रेण परीक्षेत। रूपविशेषाः-वर्णसंस्थानप्रमाणच्छायाः शरीरप्रकृतिविकारौ चक्षुर्वैषयिकाणि यानि चान्यानि, तान् चक्षुषा परीक्षेत। शरीरोपचयापचयायुर्लक्षणबलवर्णविशेषाः चक्षुरिन्द्रियविज्ञेयाः ( सुसू. १०.४-५ ) गन्धविशेषाः आतुरस्य सर्वशरीरगतान्गन्धान्प्रकृतिवैकारिकान्घ्राणेन परीक्षेत। स्पर्शविशेषाः- स्पर्शं प्रकृतिविकृतियुक्तं हस्ताभ्यां परीक्षेत। शीतोष्णश्लक्ष्णकर्कशमृदुकठिनत्वादयः स्पर्शविशेषाः ज्वरशोफादिषु ( सुसू. १०.५ ) रसविशेषाः- रसं तु खलु आतुरशरीरगतमिन्द्रियवैषयिकमप्यनुमानादवगच्छेत्, न हि अस्य प्रत्यक्षग्रहणमुपपद्यते; तस्मादातुरमुखरसमातुरपरिप्रश्नेनैव विद्यात्। यूकासर्पणेन त्वस्य शरीरवैरस्यम्। मक्षिकोपसर्पणेन शरीरमाधुर्यम् ( चवि. ४.७; सुसू. १०.५ ) प्रश्नविषयः- ग्रहण्यास्तु मृदुदारुणत्वं स्वप्नदर्शनमभिप्रायं द्विष्टेष्टसुखदुःखान्यातुरपरिप्रश्नेनैव विजानीयात् ( चवि. ४.८ ) प्रश्नेन च विजानीयाद्देशं कालं जातिं सात्म्यम् आतङ्कसमुत्पत्तिं वेदनासमुच्छ्रायंबलमन्तरग्निं वातमूत्रपुरीषाणां प्रवृत्त्यप्रवृत्तीकालप्रकर्षादींश्च विशेषान् ( सुसू. १०.५ ) अग्निं जरणशक्त्या परीक्षेत, बलं व्यायामशक्त्या, श्रोत्रादीनि शब्दाद्यर्थग्रहणेन, मनोऽर्थाव्यभिचरणेन, विज्ञानं व्यवसायेन, रजः सङ्गेन, मोहमविज्ञानेन, क्रोधमभिद्रोहेण, शोकं दैन्येन, हर्षमामोदेन, प्रीतिं तोषेण, भयं विषादेन, धैर्यमविषादेन, वीर्यमुत्थानेन, अवस्थानमविभ्रमेण, श्रद्धामभिप्रायेण, मेधां ग्रह-

**णेन, संज्ञां नामग्रहणेन, स्मृतिं स्मरणेन, ह्रियमपत्रपणेन, शीलमनुशीलनेन, द्वेषं प्रतिषेधेन, उपधिमनुबन्धेन, धृतिमलौल्येन, वश्यतां विधेयतया, वयोभक्तिसात्म्यव्याधिसमुत्थानानि कालदेशोपशयवेदनाविशेषेण, गूढलिङ्गं व्याधिमुपशयानुपशयाभ्यां, दोषप्रमाणविशेषमपचारविशेषेण, आयुषः क्षयमरिष्टैः, उपस्थितश्रेयस्त्वं कल्याणाभिनिवेशेन, अमलं सत्वमविकारेण** ( चवि. ४.८ ) **अपरा अष्टविधा परीक्षा– 'नाडीं मूत्रं मलं जिह्वां शब्दं स्पर्शं दृगाकृतिम्।' परीक्षेत** (योगरत्नाकरे प्रथमभागे)

रोगाची परीक्षा. रोग समजावा म्हणून रोग्याची परीक्षा. **परीक्षा करावयाच्या गोष्टी–** रोग्याचा वर्ण, स्वर, वास, रस, स्पर्श, कान, नाक, जीभ, स्पर्शेंद्रिय, मन, भक्ति, पावित्र्य, स्वभाव, आचार, स्मरण, आकृति, प्रकृति, विकार, शक्ति, ग्लानि, धारणाशक्ति, हर्ष, रूक्षता, स्निग्धता, झापड (गुंगी), कार्याची आरंभशक्ति, जडपणा, हलकेपणा, इतर गुण, आहार, विहार, आहारपचन, आहारापासून उपाय, अपाय, विकार, विकाराचे पूर्वरूप, वेदना, उपद्रव, छाया, प्रतिच्छाया, स्वप्ने, दूताचे गुणदोष मार्गात घडणारे इष्टानिष्ट शकुनासारखे प्रसंग, रोग्याच्या घरातील शुभाशुभ घटना, औषधिप्रक्रिया व औषधियोजना यांचे ज्ञान, ही सर्व पारखली पाहिजेत. प्रत्यक्ष, अनुमान, शास्त्रवचन, यांच्या साहाय्याने आयुष्याचे प्रमाण जाणून घेणाऱ्या जिज्ञासू वैद्याने ही सर्व पारखावी. यापैकी काही चिन्हे परीक्ष्य पुरुषाच्या शरिरावर दिसतात. पण काही त्याच्या शरिराच्या आश्रित नसतात. अशी ती युक्तीने व शास्त्रकारांच्या उपदेशाप्रमाणे परीक्षावी. पुरुषाच्या आश्रयाने असलेली चिन्हे दोन प्रकारची. म्हणजे प्रकृति म्हणून आणि विकृति म्हणून असतात. रोग्याच्या शरिरावर असलेल्या चिन्हांचे परीक्षण संक्षेपतः दर्शन, स्पर्श, आणि प्रश्नांनी करावे.

विस्ताराने परीक्षण करावयाचे उपाय–याचे प्रकार सहा– डोळे, कान, इत्यादी पाचांनी पाच व प्रश्नाने सहावा. (१) शब्दविशेष–आतड्यातील गुरगुर आणि बोटे, पेरी, यांच्या सांध्यातील आवाज, आणि शरिरातील दुसरे कोणतेही शब्द कानाने परीक्षावे. (२) रूपविशेष–वर्ण, शरिराच्या अवयवांची स्थिति, प्रमाण, छाया, प्रकृति, विकार, आणि दुसरे डोळ्यांनी समजावयाचे गुणकर्म डोळ्यांनी परीक्षावे. शरिराची पुष्टी कृशता आयुष्याची लक्षणे, बल, वर्ण, ही डोळ्यांनी समजण्यासारखी आहेत. (३) वासांचे विशेष–रोग्याच्या सर्व शरिरातील स्वाभाविक व विकृत वास नाकाने परीक्षावे. (४) स्पर्शविशेष–स्वाभाविक किंवा विकृत असा स्पर्श हातानी पहावा. थंड, उष्ण, गुळगुळीत, खरखरीत, मऊ, कठीण इत्यादी स्पर्शाचे प्रकार– ज्वर, सूज, इत्यादी रोगामध्ये पहावे. (५) रसाचे विशेष–रोग्याच्या शरिरातील रस वैद्याने जिभेने प्रत्यक्ष पाहू नये. अनुमानाने जाणून घ्यावे. अंगावर सारख्या माशा बसत असतील तर शरिराचा गोडपणा आणि उवा झाल्या असतील तर शरिराची विरसता समजून घ्यावी. रोग्याच्या तोंडाचा रस प्रश्नाने समजून घ्यावा. (६) प्रश्नविशेष–ग्रहणी मृदु आहे किंवा कठीण आहे, कोणते पदार्थ आवडतात, कोणते आवडत नाहीत, कोणते मानवतात, कोणते मानवत नाहीत, सुखदुःख स्वप्न इत्यादी गोष्टी प्रश्नाने समजाव्या. त्याच प्रमाणे देश, काल, जाति, संवयीचे पदार्थ, रोगाची उत्पत्ति, वेदनांची वाढ, शक्ति, पचनशक्ति, वात, मूत्र, मल यांची प्रवृत्ति किंवा अप्रवृत्ति इत्यादि आणि वेळा हे सर्व प्रश्नाने समजावे. अग्नि पचनशक्तीने, बल व्यायामशक्तीने, कान इत्यादी शब्द इत्यादींच्या ग्रहणाने, मन अर्थाचे व्यवस्थित ग्रहण होणे किंवा न होणे यावरून, विज्ञान प्रवृत्तीवरून; रज–कोणत्याही विषयाच्या आसक्तीवरून, मोह–योग्य ज्ञान न होण्याने; क्रोध–परपीडेच्या प्रवृत्तीने; शोक–रडणे इत्यादींवरून; हर्ष–गाणे, वाजवणे, नाचणे इत्यादींवरून; प्रीति–संतोषावरून, भय, विषण्णतेने; धैर्य–विषण्णतेच्या अभावाने; वीर्य–तडफेने; स्थिरमतित्व–अस्थिर विचारांच्या अभावाने; श्रध्दा–मागणीवरून; मेधा–विषयग्रहणावरून; संज्ञा–नावे घेतल्याने; स्मृति–स्मरणाने; लज्जा–लाजेने वागण्याने; शील– हे नित्य सेवनावरून; द्वेष–झिडकारण्याने; कपट–त्यासंबंधी होणाऱ्या हालचालीवरून व नंतरच्या परिणामावरून. धृति–म्हणजे मनोनिग्रह लालची स्वभावाच्या अभावावरून; वश्यता सांगितल्याप्रमाणे केलेल्या कृतींवरून; वय, भक्ति, सात्म्य, व्याधीची कारणे ही काळ, देश, आहार-विहारांचा उपयोग, व वेदना याच्या विशेषांनी. ज्याची चिन्हे अव्यक्त आहेत तो रोग शमविणाऱ्या व वाढविणाऱ्या आहार-विहारांतील द्रव्यांवरून.

दोषांच्या प्रमाणांचा विशेष–अपकार करणाऱ्या पदार्थांच्या स्वरूप–गुण विशेषाने. आयुष्याचा क्षय–मरण दर्शक चिन्हांनी. मिळालेले श्रेय–श्रेयस्कर मार्गाचा किती निश्चयाने अवलंब केला यावरून; निर्मल मन–विकृति न होण्याने ओळखावें. दुसऱ्या आठ प्रकारच्या परीक्षा–नाडी, मूत्र, मल, जिव्हा, शब्द, स्पर्श, दृष्टि आणि आकृति ह्या होत.

**रोगेश**–पु., रोगाणामीशः, **राजयक्ष्मा** ( चचि. ८.११३ )
क्षय.

**रोगोच्छेद**–पु., रोगस्योच्छेदः रोगनाशः ( अहृसू. ८.४४ )
रोगाचा उच्छेद. रोगनाश, चिकित्साफल.

**रोगोपक्रम**–पु., रोगस्योपक्रमः, **उपचारचिकित्सितम्** ( असंसू. २२ )
रोगाची चिकित्सा, उपचार.

**रोचन**–पु., वनस्पति० **रोहितकः** ( ध. ५.१३० )
रक्तरोहडा.
**जम्बीरः** ( ध. ५.१४ ) ईडलिंबू.
**करञ्जः** ( रा. ९.१७६ ) करंज.
**निम्बूकः** ( रा. ११.२२ ) निंबू.
**शिग्रुभेदः, मधुशिग्रुः** द्र० **'शिग्रु'** ( रा. ७.६४ )
गोड शेवगा.
**दाडिमः** ( रा. ११.९४ ) डाळिंब.
**अङ्कोलः** ( रा. ९.३८४ ) अंकोल.
**आरग्वधः** ( रा. ९.३३३ ) बहावा.
**कन्द० पलाण्डुः** ( रा. ७.१०१ ) कांदा.
न., भैषज्य० **गोरोचना, गोरोचनम्** (सुउ.११.१२; असंसू. ६; अहृसू. ५.६२ ) गोरोचन.

**(रोचना)**–स्त्री., भैषज्य० **गोरोचना** ( चसू. १.६९; काकषट्ककल्पाध्याय २८; सुचि. ९.१०; ध. ३.२०; र. ४.६४-६५ ) गोरोचन.

**( रोचनी )**–स्त्री., वनस्पति० **दन्ती** ( रा. ६.३३८ )
दाती.
**आमलकम्** ( रा. ११.३२६ ) आवळा.
भैषज्य० **गोरोचना** ( रा. १२.३३ ) गोरोचन.

**–फल**–पु., वनस्पति० **मातुलुङ्गः** ( रा. ११.२७ )
महाळुंग.

**(–फला )**–स्त्री., **चिर्भटम्** ( रा. ७.२६२ ) चिभडे.

**रोचनक**–पु., वनस्पति० **जम्बीरः** ( ध. ५.१४ )
ईडनिंबू.

**( रोचनिका )**–स्त्री., वनस्पति० **वंशरोचना** (रा. ६.८६)
गोरोचन,

**रोचिष्णु**–वि., **रोचनशीलं रुचिकरं वा** ( सुसू. ४५.१९३-१९४; अहृसू. ५.३० )
रुचि करणारे, रुचकर.

**रोदन**–न., लक्षण० **आक्रन्दनम्** ( मानि. बालरोग ४ )
रडणे, रड.

**( रोदनी )**–स्त्री., **रेवतीग्रहस्य नाम** ( काबालग्रह )
रेवतीग्रहाचे नाव.

**रोदनिका**–स्त्री.,वनस्पति० **धन्वयासः** (रा.३.२५)धमासा.

**रोध**–पु., **अवरोधः, यथा मूत्रस्य मलस्य वाऽवरोधः** ( र. १७.१ ) **यथा वाताऽवरोधः** ( विहृसू. ४.२ )
अवरोध. जसे वात, मूत्र, मल, यांचा अवरोध.

**रोधन**–न., पारदसंस्कार० **जलसैन्धवयुक्तस्य पारदस्य दिनत्रयपर्यन्तं घटयन्त्रे स्थापनम्** ( र. ८.६८ )
द्र० **' पारद '**
रोधन नावाचा पारदावरील संस्कार.सैंधवयुक्त पाण्यात पारा घालून कुपीत तीन दिवस विधिपूर्वक ठेवणे.

**रोधस्**–न., **तीरम्** ( असंसू. ४ )
नदीचा तीर, नदीच्या कडेची जागा.

**रोध्र**–पु., न., वनस्पति० **लोध्रः** ( ध. ३.१७५ )
**न्यग्रोधादिगणे** ( सुसू. ३८.४८ ) **तिल्वकः** ( सुसू. १२.२७-२८; अहृसू. १५.२६)
लोध्र. वड इत्यादी गणात आहे.
**शाबरकलोध्रः, शाबरम्, शावरम्** (अहृसू.१५.२६;सुउ.४०.६४) एक प्रकारचा लोध्र.

**–पुष्प**–पु., सर्प० **मण्डलिसर्पभेदः** ( सुक. ४. ३४(२)
घोणस.

**–पुष्पक**–पु., सर्प० **वैकरञ्जेभ्यस्त्रिभ्यो जातः** (सुक. ४.३४) द्र० **'सर्प'**
रोध्रपुष्पक नावाचा साप. वैकरंज ह्या सर्पाच्या मादी पासून उत्पत्ति असलेला.
धान्य० **लोध्रपुष्पाकारः शूको यस्य, लोध्रशूकः** ( सुसू. ४६.४ )
लोध्रपुष्पासारखे तूस असलेले ( धान्य ).

**–युग्म**–न., वनस्पति० **लोध्रद्वयम्, लोध्रः शाबरक. लोध्रश्च** (अहृसू.१५.४१;अहृसू.१५.२६;असंसू.१६) **एकः शाबरलोध्रोऽन्यः पट्टिकालोध्रः श्वेतलोध्रो लाक्षाप्रसादनः वा इति** ( शालिग्रामनि. पृ. २२० )
रोध्रद्वय, दोनही प्रकारचे रोध्र. शाबर व पट्टिकालोध्र- पांढरा रोध्र लाख स्वच्छ करतो.

**( रोम )–कन्द्**–पु., वनस्पति० **कन्दग्रन्थिः** ( रापरि. ७.२४ )
पांढरा अळू, कन्दग्रंथि.

**–कान्त**–न., खनिज० **कान्तलोहप्रकाराणामन्यतमम्** ( र. ५.८९; ध. ६.२९ )
कांतलोहाचा प्रकार.

**–कूप**–पु., **रोमरन्ध्रम्** ( सुसू. ३१.१७ ) **रोमविवरम्, रोमकूपो धमनीमुखप्रतिबद्धः** ( सुशा. ९.९ ) **रोमकूपा न कदाचन वर्धन्ते, ते च ध्रुवा मर्त्यानाम्** ( सुशा. ४.६० )
रोमरंध्र. हे केसाचे च्छिद्र धमनीच्या तोंडाशी संलग्न असते. रोमरंध्रे कधीही वाढत नाहीत. ती प्राण्यांची तशीच राहातात.

**–च्छेदिन्**–वि., शस्त्रगुण० **शरीरजरोम्णां संयोगमात्रेणैव च्छेदं करोति इति, सुनिशितं शस्त्रं रोमच्छेदि भवति** ( ड. सुसू. ८.१४ ) द्र० 'शस्त्र'
रोम म्हणजे अंगावरील अत्यंत बारीक केस ( लव ) कापणारे धारदार ( शस्त्र ).

**–च्युति**–स्त्री., लक्षण० **रोमशातः, रोमपतनम्** ( अहृसू. ११.२२ )
रोम गळून पडणे, केस गळणे.

**–फल**–न., वनस्पति० **भव्यम्** ( ध. ५.३९ )
करमर.

**–भोजिन्**–पु., रक्तजक्रमि० **रोमादः, रोमाणि भुङ्क्तेऽसौ इति रोमभोजी, स कुष्ठविसर्पपिडकादीन् रोगान् करोति, रोमभोजिषु इन्द्रलुप्तविधानवत् चिकित्सा कर्तव्या** ( सुउ. ५४.३७ )
रोमभोजी. रक्तज क्रमीचे नांव. शरिरावरील लव ( रोम ) खातात ते रोमभोजी. या रोमभोजी क्रमींमुळे कुष्ट, विसर्प, पिडका इत्यादी रोग होतात. त्वचा चाइ ( इंद्रलुप्त ) झाल्याप्रमाणे; मधलेच केस गेलेली (दिसते) यावर चिकित्सा इंद्रलुप्ताप्रमाणे करावी.

**–राजि**–स्त्री., **रोम्णां समूहः पङ्क्तिर्वा** (असंशा.२)
रोमांची ओळ.

**–राजी**–स्त्री., **रोमराजिः** (चनि. ३.१४) केसांची ओळ.

**–राज्युद्गम**–पु., लक्षण० **रोमराजिप्रादुर्भावः** ( सुशा. ३.१४-१५ )
रोमराजी उत्पत्ति, केसांची रांग उत्पन्न होणे.

**–वल्ली**–स्त्री., वनस्पति० **कपिकच्छूः** ( रा. ३.२०२ )
खाजकुहिली,

**–शतन**–न., लक्षण० **लोमपतनम्** ( र. २०.१९७ )
लोम पडणे, केस पडणे.

**–शातन**–न., क्रिया० **लोमापहरणम्** ( सुचि. १.१०६ )
केस, लव काढणे.
**औषधयोग० द्वौ भागौ शङ्खचूर्णस्य हरितालं चैकभागम्, शुक्तेन सह पिष्टं लोमशातनम्** ( सुचि. १.१०५ )
लोमपातनासाठी औषध. शंखचूर्ण २ भाग, हरताल १ भाग कांजीमध्ये वाटून लावावे.

**–संजनन**–न., **लोमोत्पत्तिकरं कर्म, व्रणस्य षष्ट्युपक्रमेष्वेकः तदर्थं लेपः; हस्तिदन्तमसीरसाञ्जनेन अजाक्षीरसहितेन लेपाद्रोमाणि जायन्ते** ( ड. सुचि. १.८ )
लोमोत्पत्तिकर कर्म. व्रणाचे साठ कर्मांपैकी एक. त्या करिता लेप–हस्तिदंतमषी रसांजन यांचा शेळीच्या दुधात लेप करणे.

**–संवेजन**–लक्षण० **रोमहर्षः** ( सुसू. ४२.१०(२)
अंगावर शहारे येणे.

**–हर्ष**–पु., लक्षण० **रोमाञ्चः, रोम्णामुद्गमः** ( चनि. १.३३ )
अंगावर रोमांच उभे रहाणे.

**रोमश**–पु., क्रमि० **कफजक्रमिः, यतोऽयं सर्वतो रोमान्वितः तेन रोमश इति अन्वर्थकनामा शुक्लवर्णः** ( सुउ. ५४.१३ ) द्र० ' क्रमि '
रोमश नावाचे कफज क्रमि. हा पांढरा व सर्वांगावर केस असलेला असतो.

**रोमाञ्च**–पु., लक्षण० **रोम्णां नाम केशानामग्रोत्थापनं रोमहर्षः** ( र. १२.९ ) **लोम्नां संहर्षणम्** ( र. २१.२-३ )
अंगावर रोमांच उभे रहाणे. केसांची टोके ताठ होणे.

**रोमाञ्चिका**–स्त्री., वनस्पति० **रुदन्ती** (रापरि. ५.१५)
रुद्रवन्ती, रुदन्ती.

**रोमान्तिका**–स्त्री., रोग० **पिडकाज्वरादियुक्तो रोगः, पित्तकफजन्योऽयम्, लक्षणम्–क्षुद्रप्रमाणाः शरीरे सर्वाङ्गगाः सज्वरदाहतृष्णाः कण्डूयुता अरुचिप्रसेकसहिताः पिडका भवन्ति** ( चचि. १२.९२ ) **रोमकूपोन्नतिसमा रागिण्यः कासंसयुक्ता रोमान्त्यः** ( मा. )

रोमान्तिका रोगाचे नाव. ताप येऊन अंगावर पुटकुळ्या उठतात. पित्तकफजन्य असा हा विकार आहे. या विकारात सर्व शरिरावर अल्प प्रमाणात कण्डू असणाऱ्या पुटकुळ्या उठतात. त्या वेळी ताप, दाह, तहान, अरुचि, आणि प्रसेकही चिन्हे असतात.

**रोमाद**–पु., **कृमि० रोमाण्यत्तीति, शोणितजः कृमिः, अदृश्योऽयम्, असाध्यः** ( सुउ. ५४.१५ ) **द्र० 'कृमि'**
शरिरावरील रोम खाणाऱ्या कृमीचे नाव. रक्तज कृमि–अदृश्य असतात; विकार असाध्य.
**वनस्पति० कन्दग्रन्थिः** ( रापरि. ७.२४ )
पांढरे रताळे.
**कुम्भीरः** ( रापरि. ९.१९ ) एक वनस्पती.
वि., **अवस्था० कठिनावस्थायां प्राप्तः** ( सुसू. ४३.४ )
कठिण अवस्थेत सापडलेला.
**खनिज० कासीसम्** ( चचि. २९.१५२ ) हिराकस.

( **रोमशा** )–स्त्री., **वनस्पति० दुग्धा** ( रापरि. ९.२८ )
लवयुक्त खरखरीत पानांची जळाली तरी शेष भाग पुन्हा वाढणारी वनस्पती.
**जलूकाभेदः, सा वलियुक्तत्वाद्रोमाऽवततेव प्रतिभाति** ( सुसू. १३.११ ) **द्र० ' जलूका '**
केसाळ जळू.
वि., **लोमशा** ( सुचि. ३०.१२-१३ )
वळ्या असल्यामुळे अंगावर केस असलेली अशी दिसणारी जळू.

**रोमालु**–पु., **वनस्पति० कपिकच्छूः** ( रा. ३.२०२ )
खाजकुहिली.
**कन्दग्रन्थिः** ( रापरि. ७.२४ ) पांढरा रताळू.

**रोमावर्त**–पु., **शरीरे केशानामावर्तः** ( असंशा. ७ ) **आवर्तवद्वर्तुलाकारा केशरचना, स्थानमेतदधिपति नाम्नः कपालान्तर्गतमर्मणः, मस्तकस्याभ्यन्तरोर्ध्वं मर्म, बहिरस्य लक्षणमुपरिष्टाद्रोमावर्तः** (सुशा. ६.२७)
डोक्यावर असलेला केसांचा भोवरा (केसांची भोवऱ्यासारखी गोलाकार रचना). मस्तकाच्या आत अनेक शिरांचा एके ठिकाणी जो संधि आहे तेथे अधिपति नावाचे मर्म आहे. हा भोवरा बाहेर असणे हे त्या मर्म स्थानाचे स्थानदर्शक आहे.

**रोष**–पु., **कोपः, क्रोधः** ( चशा.५.५ ) संताप, क्रोध.

**रोषांश**–पु., **क्रोधांशः** ( चशा. ४.३६ )
क्रोधाचा अंश. (हे राजसगुणाचे लक्षण )

**रोहण**–न., ( परिव० ) **रोपणम्** ( सुचि. १.१११ ) **व्रणसन्धानम्** ( सुशा. ६.२५ )
जखम भरुन आणणे, जखम भरून येणे.

**रोहत्पर्वा**–स्त्री., **वनस्पति० दूर्वाभेदः मालादूर्वा, द्र० ' दूर्वा '** ( रा.८.२३२ ) दूर्वांचा प्रकार.

**रोहा**–स्त्री., **वनस्पति० अञ्जलिकारिका** ( जञ्जटः ) **लज्जालुः** ( चचि. ३.२६७ ) लाजाळू.

**रोहिण**–पु., **पशु० गवयः, तस्य गुणाः–मधुर उष्णः स्निग्धो वृष्यः कफपित्तकरः** ( धपरि. ६.३४ )
रोहिण जातीचा पशु. मांसाचे **गुण**—गोड, स्निग्ध, वृष्य, उष्ण, कफपित्तकर.
**वनस्पति० भूतृणम्** ( रापरि. ८.४२ ) रोहिसगवत.
**वटः** ( रा. ११.११३ ) वड.

**रोहिणी**–स्त्री., **शारीर० त्वग्विशेषः, असौ व्रीहिप्रमाणा** (असंशा. ५.३२) **षष्ठी त्वग्, वेदिन्यास्त्वचोऽधःस्थितः। सा ग्रन्थ्यपच्यर्बुदश्लीपदगलगण्डाधिष्ठाना** ( सुशा. ४.४ ) **द्र० ' त्वच् '**
शरिरावरील सहावी त्वचा, व्रीहिप्रमाण असते. वेदिनी त्वचेच्या खालची, या त्वचेवर ग्रंथी, अपची, अर्बुद, श्लीपद, गलगंड हे विकार होतात.
**सिरा० लोहिताऽपरपर्याया, सा नाऽत्युष्णशीतला, रक्तवहा** ( सुशा. ७.१८ ) **सा समा गूढा स्निग्धा शुद्धरक्तं वहति** ( असंशा. ६.२७ ) **द्र० 'सिरा'**
रोहिणीसिरा. हिलाच लोहिता असे दुसरे नाव आहे. ती अतिउष्ण किंवा थंड स्पर्शाची नसते, समशीतोष्ण असते. सरळ व खोल आणि स्निग्ध असून शुद्ध ( विशुद्ध ) रक्ताचे वहन करते.
**जलचारिपक्षिविशेषः** ( चसू. २७.४४ ) जलचर पक्षीविशेष.
**वनस्पति० हरीतकी** ( ध. १.२०५ )
हिरड्याचा एक प्रकार.
**मञ्जिष्ठा** ( रा. ६.१५ ) मंजिष्ठा.
**मांसी** ( रा. १२.१३९ ) जटामांसी.
**काश्मरी** ( रा. ९.१४७ ) शिवण.
**कटुका** ( सुउ. ३९.२१४; र. २२.१३१; ध. १.३७; चचि. ७.१००; चसू. ४.१०; असंसू. १५; चचि. ३०.२६१; असंचि. १८ )
कुटकी.

**कटुतुम्बी** ( सुचि. १.८६ ) कडु भोपळा.
**कट्फल** ( सुसू.३८.४८-४९ ) कायफळ.
**मुखरोग० जिह्वामूलगतो गलरोगः** ( सुसू. ११.७ ) **विरुद्धाऽशनजो रोगोऽयं** (चसू. २६.८४) **त्रिदोषात्मक आशुकारी भृशशोथवान्** ( चसू. १८.३५ ) **दुष्टरक्तजो मांसाङ्कुरयुक्तो गलरोधी** (सुनि. ४६,४७) **सम्प्राप्तिः— प्रकुपिता वातपित्तकफा गलमाश्रित्य जिह्वामूले समन्ताच्छोणितं प्रदूष्य मांसाङ्कुरान्सृजन्तो गलस्याऽवरोधं कुर्वन्ति** ( सुनि. १६.४७; असंउ. २५ ) **लक्षणम्— वातजरोहिणी—भृशवेदनायुक्ता मांसाङ्कुराः कण्ठरोधिनः स्युः, तालु कण्ठश्च शुष्यति, कण्ठेऽन्नं प्रसज्यते, तत्र कम्पविनामस्तम्भादय उपद्रवा भवन्ति । सप्ताहाच्च रुग्णो जहत्यसून्** ( सुनि. १६.४८ ) **हन्वोः श्रोत्रयोश्च रुजं करोति** ( असंउ. २५ ) **पित्तजरोहिणी—अस्या तीव्र ज्वर-ऊषा-तृण्मोह-कण्ठधूमायनानि भवन्ति । सा शीघ्रोत्थाना शीघ्रपाकाऽतिलोहिता स्पर्शनाऽसह्या च** ( सुनि. १६.४९; असंउ. २५ ) **तीव्रज्वर चतुर्दिनात् प्राणनाशिनी**— ( गयीच सुनि. १६.४९ ) **कफजरोहिणी—कफादन्तर्बहिःशोथः श्वासः कण्ठरोधः इत्येतानि लक्षणानि व्याधितस्त्र्यहादसून्त्यजेत्** ( गयिः सुनि. १६.४९ ) **पिच्छिला पाण्डुरा च वर्तते** ( असंउ. २५ ) **रक्तजरोहिणी स्फोटयुक्ता पित्तसमानलिङ्गा सा रुधिरात्मिकाऽसाध्या** ( सुनि. १६.५० ) **वर्णतः स्पर्शतो वा तप्ताङ्गारनिभा कर्णरुजाकरी च** (असंउ. २५) **संनिपातजरोहिणी—त्रिदोषलक्षणयुक्ता गम्भीरपाकाऽसाध्या** ( सुनि. १६.५० ) **चिकित्सासाध्यायामवस्थायां शोणितमोक्षणं छर्दनं धूमपानं गण्डूषो नस्यकर्म च कार्यम्** (सुचि. २२.५९-६०) **रोहिणीरोगी धूमपाने गर्हितः** ( चसू. ५.४५; असंसू. ३० ) **रोहिण्यां शोणितमोक्षणविधिः, अङ्गुलिशस्त्रकेण मधुलवणगर्भेण वा नखेन सम्यग्लिखित्वा विस्रावयेत्, गण्डूषं नावनं च कुर्यात्** ( सुसू. २५.९-१०; असंसू. २६ )

रौहिणी नावाचा घशात जिभेच्या मुळाशी होणारा विकार. विरुद्ध गुणधर्मांचे पदार्थ एकत्र खाल्ल्याने होणारा हा विकार त्रिदोषात्मक आहे. त्वरित प्राणघातक, घशात खूप सूज रक्तदुष्टीने मांसाकुर वाढून गळ्याचा अवरोध करणारा विकार, प्रकुपित झालेले त्रिदोष घशात रक्ताला दूषित करून जिव्हामूळाशी सभोवार मांसांकुर निर्माण करतात. त्यामुळे गिळणे, श्वासोछ्वास ह्या क्रियेस अवरोध होतो. **वातज रोहिणी**—या मध्ये फार वेदना होतात. तालु, कंठ वाळतो. मांसांकुराने गळ्यात अन्न टोचते-अडकते. कंप, शरीर वाकडे होणे, जखडणे, इत्यादी उपद्रव होतात. सात दिवसात रोगी दगावतो. हनुवटी व कानात पीडा होते. **पित्तजरोहिणी**—या मध्ये तीव्र ज्वर, डोळे लाल होणे, घशातून धूर येतोसा वाटणे, लौकर उत्पन्न होऊन लौकर पिकणे, तहान, मोह, अतिलाली व स्पर्श सहन न होणे; चार दिवसात रोगी मरतो. **कफजरोहिणी**—कफामुळे घशात आतून बाहेरून सूज येते. श्वास, गिळण्यास, श्वासोछ्वासास अवरोध मांसाकुर बुळबुळीत-पांढरे असे असतात. रोगी तीन दिवसात दगावतो. **रक्तजरोहिणी**—मोठे मोठे फोड होऊन पित्तजरोहिणीप्रमाणे तीव्र चिन्हे असणारे हे मांसांकुर असतात. ही असाध्य आहे. वर्ण आणि स्पर्श जळत्या निखाऱ्याप्रमाणे असून कानात पीडा होते.
**सांनिपातिकरोहिणी**— त्रिदोषांच्या चिन्हानी युक्त अशी ही मांसांकुर स्थानी खोलवर असून पिकते. असाध्य. चिकित्सा-साध्य अवस्थेमध्ये रक्तमोक्षण, ओकारीची औषधे देणे, धूम्रपान करविणे, गण्डूष आणि नस्यकर्म करावे. चरक आणि वाग्भटमते या रोगात धूम्रपान वर्ज्य. अंगुलिशस्त्राने किंवा मध व सैधव बोटाला लावून नखाने नीट खरडून रक्त काढावे. नंतर गंडूष व नस्य करावे.

**रोहिणिका**—स्त्री., रोग० **रोहिणी** ( असंसू. ३० ) रोहिणीरोग.

**रोहिणी**—स्त्री., ( ध. १.२०५ ) हिरडा.

**—फल**—न., फल० **हरीतकीफलम्** ( सुचि. १.९५ ) हिरडा फळ.
**कटुतुम्बीफलम्** ( सुचि. १.९५ ) कडु भोपळा फळ.

**—शाक**—न., **शाक० कटुकाशाकम् तत्पयोमधुभ्यां नाभ्यवहरेत्** ( सुसू. २०.१३ )
कटुका नावाची विशेष तऱ्हेची तिखट भाजी, ती दूध मधाबरोबर खाऊ नये.

**रोहित**—पु., **मृग० पशुवर्गीयः, तस्य लोहितचर्मत्वात् नाम रक्ताजितत्वात् रोहितः** ( सुचि. २९.१३ )

कूलचरवर्गीयः ( सुसू. ४६.९४ ) महामृगेष्वेकः ( अहसू. ६.५०; ध. परि. ६.३४ )
रोहित. लाल चर्म असणारा मृग ( हरीण ) जलाशयांच्या काठी रहाणारा. मोठ्या पशूंपैकी एक.
**मत्स्य०** ( चसू. २५.३८ ) **नादेयः**–
( ड.सुसू. ४६.११५ ) **मत्स्येषु श्रेष्ठः** (असंसू. ७) **जलचरोऽयम्, यस्य उदरं मुखं नेत्रौ पक्षौ च रक्तवर्णकौ, किं वा पक्षौ कृष्णवर्णौ कुक्षिः श्वेतः अङ्गचर्म कृष्णं मुखं च वर्तुलं मतम्** ( रा. ७.४४१; र. २८.७७) **रक्ताङ्गः कृष्णपृष्ठः** (हे. अहसू.६.५२) **स्वभावः–प्रतिस्रोतोविचारी, आकाशप्लवनो नित्यं शैवालभक्षी दिवास्वप्नविवर्जी च** ( असंसू.७ ) **महाबलः** ( चसू. २७.८३ ) **घनशकलः** ( ड. सुसू. ४६.११५ ) **गुणाः–कषायाऽनुरसो लघुपाको वातहरो नात्यर्थं पित्तकोपनो दीपनीयो वर्ण्यो वृष्यश्चक्षुष्यो बलवर्धनः** ( चसू. २७.८३; सुसू. ४६.११५ ) **मधुरोऽर्धाङ्गवातापहश्च** ( ध. ६.४११ ) **अस्य मांसं चूर्णाञ्जने उपयुज्यते** ( असंउ. १२ )
रोहितमासा–नदीत असणारा, सर्व माशात श्रेष्ठ असा हा जलसंचारी आहे. ह्या रोहित माशाचे पोट, तोंड, डोळे आणि पंख काळ्या किंवा रक्त वर्णाचे असतात. व कुशी पांढऱ्या. अंगाचे कातडे काळे, तोंड वाटोळे, अंग लाल व पाठ काळी असाही हा असतो. रोहित माश्याचे गुण— कषाय, अनुरस मधुर, लघुपाकी, वातनाशक परंतु अत्यंत पित्तकोपन करणारा, अग्निदीपक, वर्ण सुधारणारा, वृष्य, चक्षुष्य, बलवर्धक आहे. याचे मांसाचे चूर्ण अंजनाकरितां उपयोगी.
हा मासा प्रवाहाच्या उलट पोहणारा, शेवाळ खाणारा, दिवसा झोप न घेणारा, आकाशात उडी घेणारा, मोठा बलवान. दाट खवले असलेला. अर्धांगवात नाशक आहे.
**वनस्पति० रोहितकः** ( रा. ८.२१७ ) रक्तरोहिडा.

**–पित्त**–न., **भैषज्य० रोहितमत्स्यस्य पित्तम्, इदं विषनाशनायाऽञ्जनरूपेण प्रयुज्यते** ( चचि. २३.१८३ )
रोहितमाशाचे पित्त. हे विषनाशनाला अञ्जन करण्याने उपयोगी आहे.

**–मत्स्य**–पु., **मत्स्य०रोहितः** ( सुशा. ५.४४ )
रोहितमासा.



**रोहितक**–पु., **वनस्पति० तस्य भेदः रक्तपुष्पः दाडिमपुष्पतुल्यपुष्पः** (ध. ५.१३०) **अन्यः श्वेतपुष्पः सिताङ्गः** ( रा. ८.२१८ ) **तस्य गुणाः– कटुः कषाय उष्णः** (ध.) **शीतः** (रा.) **स्निग्धः सरो वातकफहरः** ( शालि. नि. ) **यकृत्प्लीहरोग–गुल्मोदर–कृमि–व्रण –नेत्ररोग–रक्तरोग–कर्णरोग–भूतबाधाहरः,विषवेगविनाशनश्च** ( ध. ५.१.३० )
हिं.—रोहेडा.
**म. रक्तरोहिडा.**
गु.—रगतरोहिडो, श्वेतरोहिडो.
बं.—रोढा, रयना, नयना, कडार, ( शालि. नि. )
रक्तरोहिडा, रगतरोडा. प्रकार दोन; डाळिंबाच्या फुलासारखा लाल व पांढऱ्या फुलांचा. गुण–तिखट, तुरट, उष्ण, (शीत), स्निग्ध, सारक, वातकफहारक, यकृत्प्लीहा, गुल्म, उदर, कृमि, व्रण, नेत्र, रक्त, कर्ण यांचे रोग, विषवेग व भूतबाधा नाशक.

**–लता**–स्त्री., **रोहितकः, अयं कामलागुल्मप्लीहोदरक्रिमीन् हन्ति** ( चचि. १३.८१ )
रगतरोडा. गुण वर आहेत.

**–षट्पल**–न., **घृत० रोहितकपंचकोलसाधितमिदं प्लीहोदरे उपयुक्तम्** ( असंचि. १७ )
या नावाचे सिद्ध तूप. रक्तरोहडा व पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ ह्या औषधांनी सिद्ध केलेले. प्लीहोदरात उपयुक्त.

**रोहिताकार**–वि., **रक्तवर्णः रोहितमत्स्यवदाकारः यस्य सः यथा शकलिमत्स्यः** ( चसू. २६.८३ )
( रोहितमत्स्य ). रोहित–रक्तवर्ण स्वरूप असणारा. जसा शकली मासा.

**रोहिन्**–पु., **वनस्पति० रक्तपुष्पः रोहितकभेदः द्र० 'रोहितक'** ( ध. ५.१३० )
रक्तरोहिडा. लाल फुलांचा, रक्तरोहडा.
**पूतिकरञ्जः** ( ध. ५.१०९ ) घाणेरा करंज.
**पशु० रोहिणः** ( धपरि. ६.३४ )
तांबडा,मोठा हरीण. पहा 'रोहित'.

**रोहिष**–पु., न., **वनस्पति० कत्तृणम्** ( ध. १.८०; चक. १.९ ) **' रामकर्पूर इति ख्यातः** ( चक्र. चचि. ३.२६७ )
रोहिसगवत. याला रामकर्पूर असेही म्हणतात.
**भूतृणम्** ( ध., ४.४७; असंउ. ४३ ) रोहिसगवत.
**कन्दविष०** ( असंउ. ४० ) **द्र० ' कन्दविष '**
एक विषारी कंद.

**रोहीत**–पु., **वनस्पति० रक्तपुष्पः ( रोहितकभेदः )** ( सुउ. १७.४१ ) रक्तरोहडा. ( तांबड्या फुलांचा ) न., **रोहितकः, ' दाडिमपुष्पकाख्यम् । '** ( इन्दु; असंउ. ४३) **दाडिमपुष्पतुल्यपुष्पः** (सुउ. १७.४१) रोहितक. डाळिंब फुला सारख्या फुलांचा

**रोहीतक**–पु., **वनस्पति० शाल्मलीभेदः**, द्र० **'शाल्मली'** ( ध. ५.१३० ) एक प्रकारचा सावरी वृक्ष.

**रौक्म**–वि., **रुक्मनिर्मितः सौवर्णः ( छेदनशस्त्रविशेषः )** (चशा. ८.४४) सोन्याचे बनवलेले शस्त्र.

**रौक्ष्य**–न., **लक्षण० रोग० अशीतिवातविकारेष्वेकः रूक्षता, त्वचो रूक्षत्वम्** ( चसू. २०.११; असंसू. २० )

रुक्षत्व ज्यामध्ये अधिक आहे असा विकार. ऐशी वातविकारामध्ये एक. त्वचेचे रूक्षत्व.

**रौद्र**–वि., **रुद्राधिष्ठितम् भयंकरम्** ( चवि. ८.११९; सुशा. ४.८८ ) भयंकर, भीतिदायक.

**(रौद्री)**–स्त्री., **ग्रह० जातहारिण्या रेवत्या नाम,** ( कारेवतीकल्प० ७ ) **सा एकादशेऽहनि अपत्यं विनाशयति** ( का रेवतीकल्प० ४६ ) रेवती ग्रहाचे एक नाव. अकराव्या दिवशीं बालकाला मारते.

**वनस्पति० रुद्रजटा** ( रापरि. ३.२४ ) रुद्रजटा सुगंधी पानांची खूप पाळे असलेली वनस्पति.

**–भाव**–पु., **क्रोधात्मकः स्वभावः रुद्रः क्रुद्धश्चासौभावः स्वभाव इति** ( चचि. ३.१९ ) संतापी स्वभाव.

**–रूपिन्**–वि., **लक्षण० भयावहरूपी ( दूतादिः )** ( सुसू. २९.७-८ ) भीतिदायक रूपाचा.

**रौप्य**–न., **खनिज० गुणाः– कषायमम्लं स्निग्धं मधुरपाकि सरं रुच्यं वृष्यं वातपित्तहरं वलीपलितनाशनं विषघ्नं च** ( ध.६.५) **तस्य मारणम्–रूप्यं स्नुक्क्षीरहरितालाभ्यां म्रियते** ( र. २८.११ )

चांदी, रुपे. **गुण**– तुरट, आंबट, स्नेहयुक्त, पचल्यानंतर गोड, सारक, रुचकर, शुक्रवर्धक, वात पित्त व विष नाशक. शिवाय सुरकुत्या व केस पांढरे होणे हे उपद्रव नाहीसे करते. रुप्याचे ( चांदीचे ) मारण निवडुंगाचा चीक व हरताळ यांनी होते.

**रौरव**–वि., **रुरुः हरिणविशेषः, तत्सम्बन्धि, यथा तस्य चर्म, रौरवं चर्म** ( चशा.८.१० )

रुरु–विशेष तऱ्हेचा हरिण. त्याच्याविषयी जे जे ते रौरव. जसे–त्याचे चामडे, मांस इ०.

**रौहिणेय**–रत्न० **मरकतमणिः** ( ध. ६.४९ ) मरकत मणी. एक प्रकारचे रत्न.

**रौहित**–वि., **रोहितसम्बन्धि ( पित्तम् )** ( सुउ. १७.१३-१४ ) रोहित माश्याचे पित्त.

**रौहितक**–वि., **रोहितकसम्बन्धि ( पुष्पम् )** ( चचि. ६.३५ )

रगत रोहिड्याचे संबंधी. फूल, फळ इत्यादी.

## ल

**लकुच**–पु., न., **वनस्पति० क्षुद्रपनसः** (सुसू.४६.१५५ ) **गुणाः– तिक्तः कषाय उष्णो लघुर्दाही मलसंग्रहकृत् कफहरः** ( रा. ९.४४ ) **लकुचफलं त्रिदोषकरं शुक्रनाशनम्** ( सुसू. ४६.१५५; र. २.१०३ ) **आमं लकुचमुष्णं गुरु विष्टम्भकृत् सुपक्कं मधुरमम्लं चानिलपित्तहृत् कफवह्निकरं रुच्यं वृष्यं च** ( भाप्र. ७.३०-३२ )

हिं.—बडहर.

**म.—क्षुद्रफणस, ओटीचे फळ.**

गु.—लकुक.

बं.—डेयो, मादार.

क्षुद्र फणस. गुण–कडु, तुरट, उष्ण, हलके, दाहकर, मळाला घट्ट करणारे, कफहर, त्रिदोषकर, शुक्र नाशक. **कच्चे क्षुद्र फणस**—उष्ण,* जड, अवष्टंभक. **चांगले पिकलेले**—गोड, आंबट, वासपित्तहर, रुचिकर, शुक्राला बलकर, कफ व अग्निकर, आणि पौष्टिक.

**–फल**–न., **लकुचवृक्षस्य फलम्, निकुचफलम्, पयसा दध्ना माषसूपेन गुडेन मधुना घृतेन वा प्रागन्ते वा संयोगादहितम्** ( सुसू. २०.१३; असंसू. ९ ) क्षुद्र फणसाचे फळ. हे दूध, दही, उडदाचे कढण, गूळ, मध, तूप यांबरोबर अगोदर किंवा नंतर किंवा एकत्र खाणे अहितकर.

**लक्तक**–न., **जीर्णवस्त्रं लक्तकम्** ( चसू. १४. ११; सुचि. ३२.५ ) **धूमद्रव्येषूपयुक्तम्** (चचि.१८.७३) लक्तक म्हणजे–जुने वस्त्र. हे धूम्रपानद्रव्यामध्ये उपयोगी.

**लक्षण**–न., **आयुर्वेदः** ( चसू. ३०.३१ ) आयुर्वेदशास्त्र. **असाधारणो धर्मः** ( सुशा. १,३ ) असाधारण धर्म,

ज्ञापको हेतुः ( सुसू. ३.१४ )
ज्ञान करून देणारे कारण.
**चिह्नम्** ( चसू. ५.३८ ) **रूपम्** ( चनि. १.९ )
**लक्ष्यतेऽनेनेति इति रोगज्ञापकहेतुः** ( सुनि. ९.६ )
**व्याधिर्लक्ष्यते येनेति** (अहृसू. १.२२) **व्याधिरूपम्**
**द्र० ' रोग '** ( असंनि. १ )
रोगाचे ज्याने स्वरूप कळते ते चिन्ह.
**शारीरावयव० लिङ्गं** ( सुशा. ५.४१ )
शरिराचा भाग, शिश्न.

**लक्ष्मण**–न., **वनस्पति० यष्टिमधु** ( अहृसू. ६.९४ )
ज्येष्ठमध.

**( लक्ष्मणा )**–स्त्री., **वनस्पति० तस्याः स्वरूपम्**
**' पुत्रकाऽऽकाररक्ताल्पबिन्दुभिर्लाञ्छितच्छदा ।**
**लक्ष्मणा पुत्रजननी बस्तगन्धाऽऽकृतिर्भवेत् ॥ '**
( ड. सुशा. २.३२ ) **अस्याः पुष्पं गोक्षीरसदृशं रोमवल्लिसमन्वितं च** (अहृकोषः) **गुणाः–मधुरा शीता रसायनी बल्या त्रिदोषशमनी स्त्रीवन्ध्यत्व-विनाशिनी** ( रापरि. ७.५५ ) **पुत्रजननी** ( इन्दु. असंशा. १. पृ. २०० ) **पुंसवनार्थमस्याः कन्दं क्षीरेणाभिषुत्य दक्षिणे नासापुटे पुत्रकामायै स्त्रियै नस्यं दद्यात्** ( सुशा. २.३२ ) **अस्या मूलं पुंसवनविधौ नस्यदानार्थम्** ( असंशा. १.६१ )
लक्ष्मणा, एक मनस्पती.
स्वरूप– बाहुलीसारख्या तांबड्या थेंबाने युक्त, पाने दुधासारखी, फुले असलेली, बोकडा सारखा वास येणारी, लवयुक्त, कंदयुक्त वनस्पती. **गुण**– गोड, थंड, सर्व धातु परिषोषण करणारी, बलकर, त्रिदोषनाशक, स्त्रीचे वंध्यत्वनाशक. पुत्रकारक. कंद दुधात वाटून पुत्रेच्छा असताना गर्भिणीच्या उजव्या नाकपुडीत गर्भधारणेनंतर पहिल्या दोन महिन्यांच्या आत घालावा.
**श्वेतकण्टकारी** ( सुशा. १०.१५ ) **कण्टकारी** ( ध. १.९७ )
पांढरी रिंगणी.
**शाकफञ्जीचिल्लयादिगणे प्रोक्ता** ( चसू. २७.१०१ )
फंजी आणि चिल्लयादिगणातील विशेष तऱ्हेची भाजी.

**लक्ष्मणक**–पु., **वनस्पति० मुचकुन्दः** ( रापरि. १०.२५ )
सुगंधी पुष्पवृक्ष. पुष्कळ पानांचा लाल फळांचा.

**लक्ष्मन्**–न., **चिह्नम्** ( सुक. ४.२६ ) **रोगलक्षणम्** ( र. १२.९ ) रोगलक्षण.

**लक्ष्मी**–स्त्री., **वनस्पति० ऋद्धिः** ( ध. १.१४५ )
ऋद्धि, अष्टवर्गापैकी एक.
**शमी** ( ध. ५.९५; सुसू. १९.२९; हे. अहृसू. २९.३१ ) शमी.
**लक्ष्मणा** ( ड. सुसू. १९.२९ ) पांढरी रिंगणी.
**विष्णुक्रान्ता** ( ड. सुसू. १९.२९ ) विष्णुक्रांता.
**हरिद्रा** ( रा. ६.८१ ) हळद.
**पद्मिनी, पद्मचारिणी** ( धनि. ४.९०; असंउ. ६; असंसू. ३८ ) कमलिनी.

**–ताल**–पु., **वनस्पति० श्रीतालः** (रा.९.९५) ताड.

**–फल**–पु., **वनस्पति० बिल्वः** (ध. १०७) बेल.

**–वत्**–पु., **वनस्पति० रोहितकभेदः, श्वेतरोहितः** ( रा. ८.२१८; पृ. १९६ )
रोहिडा. पांढरा रोहिडा.

**–विलास**–पु., **पारदयोग० अभ्रक-पारद–गन्धक-मरिचादि चतुरेकषट्षट्षड्भागिकानि भृङ्गराजाऽऽर्द्रकगुञ्जायवानीपुनर्नवानां रसैस्त्रिर्भावयेत्ततश्चाऽर्कपत्रेण संवेष्ट्य पुटपाकेन पचेत् । योगोऽयं क्षयरोगनाशकः कान्तिवृद्धिकरश्च** ( र. २६.५४-५५ )
लक्ष्मी विलास नावाचे सिद्धौषध. पारा १, अभ्रक ४, गंधक ६, मिरी ६ भाग, माका, आले, गुंज, ओवा, पुनर्नवा, यांच्या रसाने तीन वेळा भावना देऊन रुईच्या पानाने वेष्टून पुटपाकाने पचवावे. हा क्षयनाशक, कांति वाढवणारा आहे.

**–वेष्ट**–पु., **धूपद्रव्य० श्रीवेष्टकः** ( रा. १२.१९२ )
धूप, ऊद.

**लक्ष्य**–न., **दृश्यम्, ज्ञेयम् यस्य लक्षणमस्ति तत्** ( चइ. ७.६ )
दृश्य, जाणण्याचे, लक्ष्यात आणावयाचे.

**–निमित्त**–वि., **लक्ष्यं ज्ञेयं, तस्य निमित्तं हेतुः** ( चइ. ७.६ )
जे जाणावयाचे ते. त्याचे कारण. लक्ष्याचे कारण.

**लगण**–पु., **नेत्ररोग० वर्त्माश्रयः, तस्य लक्षणम्–वर्त्मनि कठिनः स्थूलोऽपाकोऽरुजः कण्डूयुक्तः पिच्छिलः कोलप्रमाणो ग्रन्थिर्भवति** ( सुउ. ३.२७ ) **साध्योऽयम्** ( सुउ. १.३४ ) **स कफाद्भवति** (असंउ. ११) **चिकित्साभेद्यरोगः अयम्, भिन्ने क्षारमग्निं च युञ्जीत** ( सुउ. १४.५-६ ) **द्र० 'नेत्ररोग'**
डोळ्यांचा रोग. पापणी वर होतो. पापणीत कठीण, जाड, न पिकणारी वेदना–नसलेली, खाजयुक्त,

बुळबुळीत, बोराएवढी गाठ होते. हा रोग साध्य. कफाने होतो. चिकित्सा हा फोडून काढावा व नंतर क्षार लावावा किंवा डाग द्यावा.

**लगुड**–पु., वनस्पति० **रक्त करवीरः** ( ध. ४.२ ) तांबडी कण्हेर.

**लघु**–वि., गुण० **विंशतिगुणेष्वेकः** ( अहसू. १.१८ ) **गुरुत्वरहितः** ( चसू. १.५९ ) **आकाशगुणभूयिष्ठो वाय्वग्निगुणबहुलो गुरुविरुद्धो गुणः** ( चशा. ६.१० ) **कर्म–अनुसादकरोनुपलेपकृत्, कफहरो, लेखनो रोपणश्च** ( सुसू. ४६.५१९ ) **शीघ्रपाकी** ( चशा. ६.१० ) **लघून्यग्निसंधुक्षणस्वभावानि** ( असंसू. ११ ) **अस्य लङ्घने शक्तिः** ( अहसू. १.१८ )

हलकेपणा. वीस गुणांच्या पैकी एक. आकाश गुण भूयिष्ठ वायु व अग्निगुण अधिक असणारा गुरु गुणाच्या विपरीत गुण. **कर्म**–शरिराची ग्लानी (गळाठा) न करणारा व पुष्टि व मल न करणारा. कफहारक, दोष खरडून काढणारा, व्रण भरून दोष लवकर पचवणारा, अग्नि दीपक. लंघन सामर्थ्य आहे.

न., **वनस्पति० लामज्जकम्** ( ध. ३.८६ ) वाळा, सुगंधी द्रव्य.

( **लघ्वी** )–स्त्री., **वनस्पति० स्पृक्का** ( रा. १२.११३ ) पिंडका.

–**काय** वि., **लक्षण० संजातदेहलाघवः** ( सुसू. ४६.५०७ ) शरीर हलके झालेला.

–**काश्मर्य**–पु., **वनस्पति० कट्फलम्** ( रा. ८.१०१ ) कायफळ.

–**कोष्ठ**–वि., **लक्षण० उदरगौरवरहितः** ( सुउ. ४०-१६२ )

हलक्या कोठ्याचा, कोठ्यात जडत्व नसलेला.

–**चिर्भिटा**–स्त्री., **वनस्पति० मृगाक्षी** ( रा. ७.२५८) लहान चिभडे.

–**ता**–स्त्री., **अगुरुत्वम्** (सुसू.१४.९) लाघव, जड नसणे.

–**द्राक्षा**–स्त्री., **वनस्पति० द्राक्षाभेदः काकलीद्राक्षा, निर्बीजा, द्र० ' द्राक्षा '** (रा. ११.७९ ) द्राक्षांचा प्रकार. बी नसलेले द्राक्ष.

–**पत्रक**–पु., **वनस्पति० शिग्रुः** (ध. ४.३९) शेवगा.

–**पत्रफला**–स्त्री., **वनस्पति० उदुम्बरभेदः, नद्युदुम्बरिका, द्र० ' उदुम्बर '** ( रा. ११.१४० ) उंबर.

–**पत्री**–स्त्री., **वनस्पति० अश्वत्थभेदः, ह्रस्वपत्रिका, अश्वत्थिका, अश्वत्थि, द्र० ' अश्वत्थ '** ( रा. ११.१२२ )

पिंपळ ( एक प्रकार ) लहान पानांचा )

–**पर्णिका**–स्त्री., **वनस्पति० मूर्वा** ( रा. ३.१० ) मोरवेल.

**शतावरी** ( रा. ४.४३८ ) शतावरी.

–**पाक**–वि., **यदनायासेन पच्यते तद्** (चसि. ६.१५) जे सहजासहजी पचते ते.

–**पुट**–न., **पुट० अर्धगजपुटम्** ( रा. ५.१६७ ) अर्धे गजपुट, लघुपुट.

–**पुष्प**–पु., **वनस्पति० कदम्बभेदः भूमिकदम्बः द्र० ' कदम्ब '** ( रा. ९.१७४ ) कळंबप्रकार.

–( **पुष्पा** )–स्त्री., **वनस्पति० केतकीभेदः, सुवर्णकेतकी द्र० ' केतकी, '** ( धपरि.५.१ ) सोनकेवडी.

–**पूर्वक**–पु., **वनस्पति० भूकर्बुदारः** ( रा. ११.१५०; पृ. १८८ )

गोंदाणी, गोंधणी, लहान भोकर.

–**ब्राह्मी**–स्त्री., **वनस्पति० ब्राह्मीभेदः क्षुद्रपुत्रा द्र० ' ब्राह्मी'** ( रा. ५.१५१ ) ब्राह्मीचा प्रकार.

–**भूतद्रुम**–पु., **वनस्पति० भूकर्बुदारः** (रा. ११.१५०) गोंदाणी.

–**मन्थ**–पु., **वनस्पति० अग्निमन्थभेदः, क्षुद्राऽग्निमन्थः द्र० ' अग्निमन्थ '** ( रा. ९.१३८ ) अरणीचा प्रकार, टाकळी.

–**मांसी**–स्त्री., **वनस्पति० गन्धमांसी** ( रा. १२.९३ ) जटामांसीचा प्रकार.

–**लोकेश्वर**–पु., **पारदयोग० पारदगन्धकवराटिकाटङ्कणादिसाधितोऽयं मूत्रकृच्छ्रे उपयुक्तः** ( र. १७.२२-२५ )

सिद्धौषधाचे नाव. पारा, गंधक कवडी टाकणखार इत्यादियुक्त. कष्टाने लघ्वी होत असता उपयुक्त.

–**वर्धनक**–न., **उपक्रम० कर्णव्यधस्य लघुछिद्रम्, तस्य वर्धनार्थं यत्कर्म तत्** ( सुसू. १६.८ )

कान टोचल्यानंतर छोटे पडलेले भोक थोडेसे मोठे करण्यासाठी केलेले कार्य.

–**शीत**–पु., **वनस्पति० भूकर्बुदारः** ( रा. ११.१५० ) गोंदाणी.

–**शेलु**–पु., **वनस्पति० भूकर्बुदारः** ( रा. ११.१५० ) गोंदाणी.

–**सदाफला**–स्त्री., वनस्पति० उदुम्बरभेदः, द्र० 'उदुम्बर' ( रा. ११.१४० ) उंबराचा प्रकार.

–**सिद्धाभ्रक**–पु., पारदयोग० पारदगन्धकाभ्रक-तीक्ष्णादिसाधितोऽयं दीपनः पाचनो ग्रहण्यादिरोग-हरः ( र. १६.६२-६६ )
सिद्धौषधाचे नाव पारा, गंधक, अभ्रकादि युक्त. पाचक, दीपक, ग्रहणी इत्यादी रोगनाशक.

–**हस्त**–वि., छेद्यादिक्रियासु वेपनादिदोषरहितः ( सुसू. ३४.१९-२० )
हलका हात असलेला. शस्त्रकर्माचे वेळी कंप वगैरे नसणारा हात.

–**हेमदुग्धा**–स्त्री., वनस्पति० नद्युदुम्बरिका ( रा. ११.१४० ) द्र० 'उदुम्बर'
उंबराचा प्रकार. नदीच्या काठी होणारा.

**लघूदुम्बराह्वा**–स्त्री., वनस्पति० उदुम्बरभेदः, नद्युदुम्ब-रिका, द्र० 'उदुम्बर' ( रा. ११.१४१ )
उंबराचा प्रकार.

**लघूष्णीष**–न., शिरोवेष्टन० अल्पतन्तुकृतं शिरोवेष्टनम् ( सुचि. २४.८९ )
डोक्याला गुंडाळण्यासाठी निर्माण केलेले पातळ हलके वस्त्र.

**लघ्वक्षर**–न., अकारादिअक्षरम् ( सुसू. ६.५ )
अकार इ० अक्षर. ( अकारादि अक्षर उच्चारण्यास किंवा डोळा मिटण्यास लागणारा वेळ. यासंबंधात या ठिकाणी हा शब्द आला आहे. )

**लघ्वन्न**–न., अन्नं रक्तशाल्यादिकं मात्रातः प्रकृतितो वा लघु चचि. ३.१६३ )
हलके अन्न; पचावयास अत्यंत हलके असणारे; किंवा प्रमाणाने थोडे अन्न.

**लङ्क**–पु., प्राचीनो रसाचार्यः रसरत्नसमुच्चयकारेण निर्दिष्टानामेकतमः ( र. ६.४९-५३ )
या नावाचा रसायनशास्त्री. रसरत्नसमुच्चयात उल्लेख असलेला.

( **लङ्का** )–स्त्री., धान्य० कराला ( रा. १६.१७४ )
विशेष तऱ्हेचे धान्य, लाक, करट.

**लङ्केश**–पु., रावणः रसरत्नसमुच्चयकर्तृनिर्दिष्टेषु सप्तविंशतिसंख्याकेष्वन्यतमो रससिद्धिप्रदायकः ( र १.२-५ )
रावण. रसरत्नसमुच्चयग्रंथकर्ते २७ होते, त्यांपैकी एक.

**लङ्घन**–न., उपक्रम० ( चसू. २२.४; असंसू. २४ ) शरीर-लाघवकरं द्रव्यं कर्म वा, लघुभोजनं उपवासो वा, ( चवि. ३.४३ ) उपवासः ( अहृसू. ८.२१ ) यत्किञ्चिल्लाघवकरं देहे तल्लङ्घनम्, तदेवास्य तर्पणम्, 'लङ्घनं लाघवाय यत्' ( असंसू. २४; अहृसू. १४.२ ) लङ्घनभेदाः–शोधनं शमनं चेति द्विधा लङ्घनम् ( असंसू. २४. अहृसू. १४.४ ) दशविधं लङ्घनम्, संशुद्धिश्चतुष्प्रकारा–वमनविरेचन-नस्यरक्तमोक्षाख्या, संशमनं च षड्विधं–पिपासा-मारुतसेवनाऽऽतपसेवनपाचनोपवासव्यायामभेदा-दिति ( चसू. २२.१८ ) द्वादशविधम् निरूहवमन-विरेचननस्यरक्तमोक्षा इति पञ्चविधं शोधनं, पाचनं, दीपनं, क्षुत्तृड् व्यायामाऽऽतपमारुताश्चेति सप्तधा संशमनम् ( १४.५-७ ) लङ्घनद्रव्यस्वरुपम्-लघु-उष्ण-तीक्ष्ण विशद-रूक्ष-सूक्ष्म-खर-सर-कठिण गुणयुक्तम् ( चसू. २२.९,१२-१३ ) लङ्घनोपयोगाः–अनशन-स्वरूपः उपक्रमः आमज्वरे विशेषत उपयुक्तः तेन दोषक्षयादिकर्म भवति ( चचि. ३.१४०; १४१ ) आमाख्येऽजीर्णे लङ्घनमेव कार्यम् ( सुसू. ४६.५०५ ) दोषाणामल्पे बले उपवास-रूपं लङ्घनमग्निवृद्धिकरं भवति ( असंसू. ११ ) लङ्घन-योग्याः–मेहाऽऽमदोषज्वरोरुस्तम्भकुष्ठविसर्प–विद्रधिप्लीहशिरोरोगकण्ठरोगाऽक्षिरोगपीडितान् स्थूलांश्च अतिस्निग्धांश्च लङ्घयेत् ( असंसू. २४; अहृसू. १४. ११ ) अधिकस्थौल्यबलपित्तकफान् संशोधनेन लङ्घयेत्। आमदोषज्वरच्छर्दतीसार-हृद्रोगादिपीडितानादौ पाचनदीपनैर्लङ्घयेत्पश्चाच्छो-धनैः। एतेषामुक्तानां हीनस्थौल्यबलत्वे सति क्षुत्तृष्णानिग्रहरूपं लङ्घनं हितम्। मध्यबलै-र्दोषैरार्तान् समीरणातपाऽऽयासैर्लङ्घयेत्। बृंह-णीयेष्वार्तेषु लङ्घनसाध्यरोगोत्पत्तौ स्वल्पं लङ्घनं हितम् ( अहृसू. १४.१२-१५ ) सुलङ्घितलक्षणम्–विमलेन्द्रियता, मलानां प्रवृत्तिर्गात्रलघुता, रुचिः, क्षुत्तृषोरेककालमुदयः, हृदयोद्गारकण्ठानां शुद्धिः, रोगमार्दवमुत्साहः, तन्द्रानाशश्च ( अहृसू. १४.१६-१७; असंसू. २४; का. विशेषक ) अतिलङ्घनलक्षणम्अतिकार्श्य–भ्रम–कास–तृष्णा–ऽरोचकाऽऽदीनामाधिक्यम्। स्नेहाऽग्नि–निद्रा–दृक्–श्रोत्र–शुक्रोजः–क्षुत्–स्वरादीनां क्षयः। बस्ति–हृन्मूर्ध–जङ्घोरु–त्रिक–पार्श्व–देशे रुजा, पर्वाऽस्थि-

**भेदनं मलमूत्राऽवरोधश्च । ज्वर–प्रलापो–र्ध्ववात–ग्लानि–च्छर्द्यादयो जायन्ते** ( असंसू. २४; का विशेषक ) **लङ्घनकर्म–अनवस्थितदोषाणां पाचन-मग्नेः दीपनं ज्वरस्य नाशनमाहारेच्छाकरं रुचिकरं लाघवकरं च** (सुउ.३९.१०३) **स्वास्थ्यमोजश्च जायते** ( असंचि. १ ) **लङ्घनस्येष्टाऽनिष्टत्वम्–क्षयरोग-वातरोगवातज्वरक्रोधकामादिजज्वरेषु नेष्टं लङ्घनम्** (सुचि. १.१३ चचि. ३.१३९-१४०;) **अस्थिवृद्धौ वातक्षये लङ्घनमिष्टम्** ( अहृसू. ११.२९ ) शरिराला हलके करणारे जे द्रव्य किंवा कर्म ते लंघन. पचावयास हलके भोजन, उपवास हेही लंघनच. अपतर्पण हे लंघनाचे दुसरे नाव. शोधन आणि शमन असे दोन प्रकारचे लंघन आहे. ( १ ) वमन ( २ ) विरेचन ( ३ ) नस्य ( ४ ) रक्तमोक्षण ही चार प्रकारची शोधने आणि ( १ ) तहान ( २ ) बायुसेवन ( ३ ) उन्हाचे सेवन ( ४ ) पाचन ( ५ ) उपवास ( ६ ) व्यायाम, ही ६ प्रकारची शमने मिळून लंघन दहा प्रकारचे संभवते. बस्ति, वमन, विरेचन, नस्य, रक्तमोक्ष हे शोधन-रूप लंघन पाच प्रकारचे आणि पाचन, दीपन, भूक, तहान, व्यायाम, उन्ह, वायुसेवन हे संशमनरूप लंघन सात प्रकारचे मिळून लंघनाचे १२ प्रकार संभवतात असेहि एक मत आहे. **लंघनाच्या द्रव्याचे स्वरूप**–लघु, उष्ण, तीक्ष्ण, विशद, रूक्ष, सूक्ष्म, खर, सर, कठिण या गुणांचे आहे. **लंघनाचे उपयोग**– काहीही न खाणे म्हणजे अनशन स्वरूपाचे लंघन विशेषे करून आमज्वरात उपयोगी असते. त्यायोगे दोषांचा क्षय होतो. 'अमाजीर्णातही लंघनच करावे. दोषांचे अल्प बल असताना उपवासरूप लंघन हे अग्निवृद्धिकर होते. **लंघनाला योग्य रोग**– मेह, आमदोष, ज्वर, ऊरुस्तंभ, कुष्ठ, विसर्प, विद्रधि, प्लीहावृद्धि शिरोरोग, कंठरोग, आक्षिरोग, स्थूलदेही, अतिस्निग्ध म्हणजे अंतर्बाह्य स्नेहाचा ज्यानी भरपूर उपयोग केला आहे असे लोक, ज्यांना स्थूलता अधिक असून बल चांगले आहे व पित्त कफ अधिक आहेत अशांना शोधनरूप लंघन द्यावे, आमदोष, ज्वर, वांती, अतिसार, हृद्रोग, इत्यादी विकारांसाठी प्रथम पाचन दीपनरूप लंघन देऊन नंतर शोधनरूप लंघन द्यावे. ह्या सर्वांना जर स्थूलता व बल कमी असेल तर भूक तहानेचा निग्रह करणे, एवढ्याच स्वरूपाचे लंघन द्यावे मध्यम बलदोषांनी पीडितांना वायुसेवन, आतप-सेवन, आणि श्रमरूप लंघन द्यावे. जे बृंहणीय म्हणजे बल मांस पुष्टि करण्याजोगे असून त्यांचा रोग लंघन साध्य असल्यास त्यांना अल्प लंघन द्यावे. योग्य लंघन झाल्याची चिन्हे– इंद्रिये निर्मळ होणे, मलमूत्रांची नैसर्गिक प्रवृत्ति, गात्रे हलकी होणे, तोंडाला रुचि असणे, तहान आणि भूक एकाच वेळी उत्पन्न होणे, ढेकरा प्राकृत येणे, श्वासोछ्वास मोकळा होणे, हृदय स्पंदन प्राकृत असणे, रोगाला मृदुत्व येणे, म्हणजे त्याचा जोर कमी होणे, उत्साह उत्पन्न होणे, झापड नाहीशी होणे.

**अति लंघन घडल्याची लक्षणे**–अत्यंत कृशता श्रम, खोकला, तहान, अरुचि इ० लक्षणे बरीच वाढून शरिरातील स्निग्धता, अग्निबल, निद्रा, दृष्टि, श्रवणशक्ति, वीर्य, ओज, भूक व आवाज इ० ना क्षीणता येते. तसेच बस्ति, हृदय, डोके, माकड-हाड, बरगड्या या भागात पीडा सांधे व हाडे फुटल्यासारखी पीडा होते. मलमूत्राचा अवरोध होतो. ताप, बडबड, ऊर्ध्ववात, ग्लानि, वांती इ० उपद्रवहोतात.

**लंघनाचे कार्य**–विकृत दोषाचे पाचन, जठराग्नि प्रदीप्त होणे, ज्वरनाश, आहार घेण्याची इच्छा, तोंडाला रुचि व शरिराला हलकेपणा येतो, स्वास्थ्य प्राप्त होते व ओजोवृद्धि होते.

**लंघनाची इष्टानिष्टता**– क्षयरोग, वातरोग, वातज्वर, क्रोध कामादिजन्य ज्वर, अस्थिवृद्धि वातक्षय ह्या विकारात लंघन देणे हितावह होय.

**उत्लुत्य गमनम्** ( चवि. ६.१८ ) **गर्ताद्युत्क्रमणम्** ( सुचि. २४.९६ ) **वातप्रकोपकारणम्** ( ड. सुसू. २१.१९ )

उडी घेऊन ओलांडणे. खड्ड्यावरून उडी मारून पलीकडे जाणे. वात प्रकोप कारण.

**–बृंहणीय**–वि., **अध्यायसंज्ञा० लङ्घनबृंहणे अधिकृत्य कृतोऽध्यायः** ( चसू. २२.१ )

अध्यायाचे नाव. यात लंघन व पुष्टि याबद्दल माहिती आहे.

**लङ्घ्य**–वि., **लङ्घनयोग्यः** ( असंचि. ३ ) लंघनाला योग्य.

**लज्जा**–स्त्री., **वनस्पति० लज्जालुः** (रा. ५.१६०) लाजाळू.

संकोचवृत्तिः ( चवि. ३.७(३) )
संकोच करणारा स्वभाव. लाजाळू ( मनुष्य )

**लज्जालु**–स्त्री., वनस्पति० **गुणाः–कटुः शीता पित्त-कफघ्नी अतिसार-शोफ-दाह-श्रम-श्वास-व्रणकुष्ठ-रक्तविकारहरा च** ( रा. ५.१६० )
हिं.—लज्जावन्ती, लाजवती, शर्मानी. छुईमुई.
**म. लाजाळु, लाजरी, संकोचनी.**
गु.—रिशामणी.
बं.—लज्जावती, लाजुक.
गुण– तिखट, थंड, पित्तकफघ्न, अतिसार, सूज, दाह, थकवा, श्वास, व्रण, कुष्ठ, रक्तविकारहर.

**लज्जालुका**–स्त्री., वनस्पति० **लज्जालुभेदः गुणाः–कटुः कषाया मधुरोष्णाऽत्यर्थदीपनी मेध्या वातश्लेष्महरा रसायनयोग्या** ( असंउ. ४९ )
लाजाळूचा एक प्रकार. गुण—तिखट, तुरट, थोडी गोड, उष्ण, अतिशय दीपक धारणाशक्ति वाढविणारी, वातकफहारक, धातुपरिपोषक.

**लज्जिका**–स्त्री., वनस्पति० लज्जालुः(रा.५.१६०)लाजाळू.

**लट्वा**–स्त्री., पक्षि० **प्रतुदवर्गीयः रक्तपुच्छाऽधोभागः फेञ्चाकः** ( चसू. २७.५१ )
लट्वा एक पक्षी. पिसांच्या शेपटाचा खालचा भाग लाल असलेला. भक्ष्य टोंचून खाणारा पक्षी.

**लट्टूषक**–पु., पक्षि० **प्रतुदवर्गीयः लट्वाभेदः**(चसू.२७.५१)
**फेञ्चातकः** ( सुसू. ४६.६७ )
लट्वा पक्ष्याच्या जातीचा पक्षी.

**लट्वा**–स्त्री., वनस्पति० **लम्बा** ( इन्दु. ) **कटुका लाम्बुनी** ( असंउ. २६ ) **कुसुम्भम्** (ध. ६.११८; पृ. २३२)
कडू भोपळा, कर्डई.
**पक्षि० लट्वा** ( सुसू. ४६.६७; अहसू. ६.४७ )
लट्वा पक्षी.
**वनस्पती० कुसुम्भम्** ( ध. ६.११८ ) कर्डई.

**लट्वाक**–पु., **गुग्गुलुशाकम्** ( अहसू. ६.९३ )
गुग्गुळवृक्षाच्या पानांची किंवा फुलांची भाजी.

**लड्डूष**–पु.,पक्षि० **प्रतुदवर्गीयः** ( असंसू. ७ ) **द्र० 'प्रतुद'**
पक्षिविशेष.

**लता**–स्त्री., वनस्पति० **प्रियङ्गुः** ( सुउ. ६०.४८; असंसू. ८ ) वाघांटी.
**गुडूची** ( सुशा. १०.६० ) गुळवेल.
**दूर्वाभेदः, श्यामदूर्वा, द्र० 'दूर्वा** ( चसू. ४.१०; असंसू. १५) काळी दूर्वा.हरळी.
**श्वेतदूर्वा द्र० ' दूर्वा '** ( ध. ४.१४४ )
पांढरी दूर्वा, हरळी.
**शतपुष्पा** ( इन्दु. असंउ. ८ ) शतपुष्पा, बडीशेप.
**मञ्जिष्ठा** ( चक्र. चसि. ४.२१; चसू. ३.२७ )
मंजिष्ठ.
**सारिवा** ( ध. १.१६१ ) अनंतमूळ.
**त्रपुसम्** ( ध. १.१७५ ) काकडी.

**–करञ्ज**–पु., वनस्पति० **गुणाः– कटुः उष्णः** ( **ग्राही** ) ( शा. नि. ) **' कफवाततनुन्मेहकुष्ठ-अर्शो-व्रणहरः परं कृमिनाशनः '** ( शा. नि. ) **पत्रमस्य कटूष्णं कफवातनुच्च । तद्बीजं दीपनं पथ्यं शूलगुल्महरम्** ( रापरि. ८.२४ )
**तस्य फलं कष्टफलम् सागरगोटा इति म. भाषयाम्** ( रापरि. ८.२४ )
हिं.—करञ्जा करञ्जुवा.
**म.—सागरगोटा.**
गु.—कांकच, तेना फल–कांकचिया.
बं.—काँटा करञ्ज.
सागरगोटा, गुण– तिखट, उष्ण, मळ बांधणारा, कफवात, प्रमेह, कुष्ठ, मूळव्याध, व्रणहर. अतिशय कृमिनाशक, याचे पान तिखट, उष्ण, कफवातहर. बी–दीपक, शूल, गुल्मनाशक. फळ कांटेरी व अतिकडक असते.

**–कस्तूरिका**–स्त्री., वनस्पति० **तल्लताफलगुणाः– स्वादुशीतं लघु कफहरं वृष्यं बस्तिशोधनं हृद्यं दौर्गन्ध्यहरं बस्तिरोगमुखरोगतृष्णाच्छर्दिहरम्** (शानि) **तिक्ता छेदिनी च** ( असंसू. १२ ) **गुणतः कर्पूरसमा** ( सुसू. ४६.२०४ )
हिं.—लताकस्तूरी, मुष्कदाना.
**म.—लताकस्तूरी.**
गु.—लताकस्तूरी.
बं.—लताकस्तूरी.
त.—कठेकस्तूरी.
( शानि ) ( नाड. पृ. ६२६ )
लताकस्तूरी. फळाचे गुण– गोड, कडु, थंड, हलके शुक्राला हितकर बस्तिशोधक, हृदयाला हितकर. बस्तिरोग, मुखरोग, तहान, ओकारी, दुर्गंधी, कफ–हारक, दोषछेदक.

**–ताल**–पु., वनस्पति० **हिन्तालः** ( रा. ९.९७; पृ. १८२ ) शिंदी.

**-बीज**-न., वनस्पति० **लताकस्तूरीबीजम्** ( र. १९.३९-४१ ) लता कस्तूरीचे बी.
**ज्योतिष्मतीबीजम्** ( र. १९.३९-४१ ) मालकांगोणीचे बी.

**-मणि**-पु., भैषज्य० **प्रवालम्** ( रा. १३.७३ ) प्रवाळ.

**-वल्ली**-स्त्री., वनस्पति० **कैवर्तिका** ( रापरि. ३. ३५ ) एक वेलीसारखी वनस्पती. वस्त्राला रंग देण्याच्या उपयोगी.

**-विदल**-न., **श्यामलतादिपाटितार्धम्, व्रणबन्धनार्थमुपयुक्तम्** ( सुसू. १८.१६ ) ही वेल उभी कापून व्रण बांधण्या करिता उपयुक्त बंधन म्हणून वापरता येते.

**लताङ्गी**-स्त्री., वनस्पति० **कर्कटशृङ्गी** ( रा. ६.१११ ) काकडशिंगी.

**लतार्क**-पु., वनस्पति० **पलाण्डुभेदः, हरितपलाण्डुः,** द्र० **'पलाण्डु'** ( ध. ४.७१ ) कांद्याचा प्रकार. हिरवा कांदा.

**लद्दि**-स्त्री., **अश्वशकृत्** ( र. १०.९ ) घोड्याची लीद.

**लप्सिका**-स्त्री., कृतान्न० **तस्याः कृतिप्रकारः-" समितां सर्पिषा भृष्टां शर्करां पयसि क्षिपेत्। तस्मिन्घनीकृतेन्यस्येल्लवङ्गमरिचादिकं सिद्धैषा लप्सिका ख्याता।** ( भाप्र. कृतान्न वर्ग ) लापसी. तुपात मैदा भाजून त्यात दूध व साखर टाकून शिजवून दाट करून लवंगमिरी इत्यादी त्यात टाकावीत.

**लब्ध**-वि., **प्राप्तम्** ( सुशा. २.३२ ) मिळालेले.

**-गर्भा**-वि., **लब्धः गर्भः यया सा; प्राप्तगर्भा, स्थितगर्भा, गर्भिणी** ( सुशा. २.३२ ) गर्भिणी, गरोदर असलेली.

**-दौहृदा**-वि., **प्राप्तदौहृदा प्राप्ताऽभिलषितपदार्था उपनताभिप्रेतविषया वा** ( सुशा. ३.१८ ) डोहाळे पुरविलेली ( गर्भिणी ) पदार्थांची वा विषयांची अभिलाषा प्राप्त (पूर्ण) झालेली स्त्री.

**-पाक**-वि., **प्राप्तपाकम्** ( अहृसू. ५.५४ ) पचलेले.

**लब्धावमान**-वि., लक्षण० **अभ्यवहार्यप्राप्तपदार्थतिरस्कारः** ( चनि. ७.७(१) ) खाण्यास योग्य अशा मिळालेल्या वस्तूंचा तिरस्कार केलेले झिडकारलेले.

**लम्पक**-पु., **रसरत्नसमुच्चयकर्तृनिर्दिष्टेषु सप्तविंशतिसंख्याकेष्वन्यतमः रससिद्धिप्रदायकः** (र. १.२-५) रसरत्नसमुच्चयग्रंथकाराने उल्लेखिलेला रसशास्त्री. २७ रसशास्त्रवेत्त्यांपैकी एक.

**लम्पट**-पु., **रसरत्नकर्तृनिर्दिष्टानामेकतमः प्राचीनो रसाचार्यः** ( र. ६.४९-५३ ) रसरत्नसमुच्चय ग्रंथकाराने उल्लेखिलेला. रसशास्त्री.

**लम्ब**-वि., **लम्बमानः** ( सुचि. ७.३१ ) लोंबलेले लोंबकळणारे ( डोके )

**( लम्बा )**-स्त्री., वनस्पति० **कटुकाऽलाम्बुनी** (ध. १.१७० **इक्ष्वाकुपर्यायः** ( चक. ३.३ ) **तिक्तालाबुः** ( सुउ. ३४.७ ) **तुम्बी** (अहृसू.१५.१) कडू भोपळा.
**पत्रविष**० ( सुक. २.५; असंउ. ४० ) द्र० **'पत्रविष'** स्थावर विषांपैकी, पत्रविष.

**-कर्ण**-पु., वनस्पति० **अङ्कोटः** ( रा.९.३८४) अंकोल.

**-दन्ता**-स्त्री., वनस्पति० **सैंहली पिप्पली** ( रा. ६.१२० ) लंकेतील पिंपळी.

**-बीजा**-स्त्री., वनस्पति० **सैंहली पिप्पली** (रा. ६.११९ ) लंकेतील पिंपळी.

**-शीर्ष**-वि., लक्षण० **लम्बमानमस्तकः** (सुचि. ७.३१) लोंबणारे-लोंबकळलेले डोके असलेला ( शल्याघाताने )

**लम्बन**- लक्षण० **स्वस्थानादधोऽवनमनम्** ( अहृसू. ११.११ ) मूळ स्थानापासून खाली गेलेले.

**लम्बितार्पित**-वि., लक्षण० **अर्पितसकलदंष्ट्राप्राप्तलक्षणम्** ( **दष्टम्** ) ( चक्र. चचि. २३.१३५ ) सर्व दाढांनी घेतलेल्या खोल चाव्याचे लक्षण (खुणा) असलेला.

**लम्बुजा**-स्त्री., वनस्पति० **महामुण्डिः** ( रा. ५.२२१ ) मोठी मुंडी.

**लय**-पु., ( परिव० ) **विलयनम्** ( र. १.४१ ) **नाशः** ( सुशा. १.९ ) नाश.

**ललन**-पु., **निर्यास**० **रालः** ( ध. ३.१२१ ) राळ.
वनस्पति० **सर्जकः** ( रा. ९.२०५ ) राळेचा वृक्ष.
**प्रियालः** ( ध. ५.७२ ) चारोळी.

**ललनाप्रिय**-पु., वनस्पति० **कदम्बः** ( ध. ५.१०४ ) कळंब.
न., **वालकम्** ( रा. १०.६८ ) वाळा.

**ललाट**-न., शारीर० **सङ्ख्यया ललाटमेकम्** (सुशा.५.४) **भालदेशः प्रमाणतश्चतुरङ्गुलम्** ( चवि. ८.११७; सुसू. ३५.१२ ) **कपालम्** ( चवि. ८.१०५ )

**शीर्षस्यैकं प्रत्यङ्गम्** ( सुशा. ५.४ )
**तत्र प्राशस्त्यम् वलिनं ( भं ) सुश्लिष्टसंध्यर्धचन्द्राकृति ललाटमिष्टम्** ( असंशा. ८ )
कपाळ; भालप्रदेशीचा चार अंगुळांचा भाग. डोक्याचे प्रत्यंग. वळ्या असलेले, संधि चांगले दिसणारे. अर्धचंद्राकृति असे कपाळ चांगले.

**–भेद**–पु., **लक्षण० ललाटस्य भेदः, ललाटे भेदनवत्पीडा, अशीतिवातविकारेष्वेकः** ( चसू. २०,११; असंसू. २० )
कपाळ दुखणे. कपाळात फोडल्याप्रमाणे वेदना, कपाळाची फूट. ऐंशी वातविकारांपैकी एक.

**–लेप**–पु., **उपक्रम० औषधं पिष्ट्वा कपालप्रदेशे कृत आलेपः, प्रतिश्यायादिहरोऽयम्** ( चचि. २३.७५ )
कपाळावर लेप घालणे. पडसे इ० रोगहारक.

**ललाट्य**–वि., **ललाटे भवा ललाटसम्बन्धी ( सिरादिः )** ( अहृसू. २७.९ )
कपाळाच्या संबंधि. कपाळाशी संबंध असणाऱ्या शिरा वगैरे.

**ललित**–वि., **सुन्दरम्** ( सुशा. ३.२३ ) सुंदर.

**(ललिता)**–स्त्री., **भैषज्य० कस्तूरिका**(रा.१२.४७)कस्तुरी.

**लव**–पु., **अंशः** ( र. १६.१३८ ) **भागः** ( र. १७.१३७-३८ )
भाग, अत्यंत छोटा हिस्सा.
न., **वनस्पति० लवङ्गम्** ( ध.३.४१ ) लवंग.
**लामज्जकम्** ( ध. ३.८६ ) वाळा.

**लवङ्ग**–न., **वनस्पति०** ( चसू. ५.७७ ) **पुष्पवृन्तं द्रव्यम्, ताम्बूलद्रव्येषूपयुक्तं द्रव्यम्** ( चसू. ५.७७ ) **भुक्तेरितकफनाशार्थमुपयुज्यते** ( सुसू. ४६.४८५-४८६ ) **गुणाः– तिक्तं ( कटु–सु ) शीतं सोष्णकं तीक्ष्णं लघु स्निग्धं मधुरविपाकं हृद्यं चक्षुष्यं वृष्यं रेचनं मुखदौर्गन्ध्यनाशनम् (दीपनं पाचनं रुच्यम्–(भाप्र) त्रिदोषघ्नं विष-मूर्धरोग-कासहरम् (आध्मानशूलक्षयहरम्–(भाप्र) तृष्णापहम्** ( सुसू. ४६.२०२ ) **हिक्काश्वासहरम्** ( ध. ३.४१; रा. १२.८७ )
हिं.—लोङ्ग, लवंग.
**म.—लवंग.**
गु.—लवींग.
बं.—लवङ्ग.
त.—किरं वेर
फा.—मेहक.



लवंग–फुलांचा देठ स्वरूपाचे द्रव्य, विड्यात घालावयाच्या उपयुक्त द्रव्यांपैकी एक, जेवणानंतर होणाऱ्या कफाचा नाश व्हावा म्हणून वापरतात.
**गुण**—लवंग–तिखट, कडू, शीत, अल्पउष्ण, तीक्ष्ण, लघु, स्निग्ध, मधुरविपाकी, हृद्य, चक्षुष्य, वृष्य, रेचन, मुखदौर्गन्ध्यनाशक, त्रिदोषनाशक, विष, शिरोरोग, कासनाशक आहे. तहान नाहीशी करणारी आहे. पोटफुगी, शूल, उचकी, श्वास नाशक.

**–कलिका**–स्त्री., **वनस्पति० लवङ्गम्** ( रा. १२.८४ )
लवंग.

**लवङ्गक**–न., **वनस्पति० लवङ्गम्** ( असंसू. १२ ) लवंग.

**लवण**–न., **भैषज्य० सैन्धवादि** ( चसू. १.७०,८९ ) **पञ्चविधम्-सैन्धव-सौवर्चल-बिड-औद्भिद-सामुद्राणि अन्ये बिडस्थाने काललवणमाहुः** ( सुसू. ३७.१३-१५ ) **षड्विधम्–सामुद्रं सैन्धवं बिडं सौवर्चलं रोमकं चूलिकालवणं च** (र. १०.६९) **अष्टविधम्–सैन्धव–सौवर्चल–बिड–सामुद्र–औद्भिद–कृष्ण–रोमक–पांसुजं चेति** ( हे. अहृसू. ६.१४३-४४ ) **धूपनद्रव्येष्वेकम्** ( असंसू. ३८ ) **निरूहगणेष्वेकम्** (अहृसू. १५.३ ) **शिरोविरेचनार्थमुपयुज्यते** ( सुसू. ३९.६ ) **गुणाः– लवणरसं, मधुरपाक्युष्ण–तीक्ष्ण–मृदु–सूक्ष्माग्निकरं रुच्यं वातघ्नं कफपित्तकृत्, सृष्टमलम्**(अहृसू. ६१४३; असंसू. १२; रापरि. २०.६१ ) **गुल्मे हितकरं** ( सुउ. ४२.५९ ) **प्रायो लवणमचक्षुष्यमन्यत्र सैन्धवात्** ( असंसू. १८) **क्षीरेण सह लवणं विरुद्धम्** ( असंसू. ९ ) **अतियोगः– ' अत्यर्थमुपयुज्यमानं शरीरस्य ग्लानिशैथिल्यदौर्बल्याभिनिर्वृत्तिकरं भवति, ये ह्येनं ग्रामनगरनिगमजनपदाः सततमुपयुञ्जते, ते भूयिष्ठं ग्लास्नवः शिथिलमांसशोणिता अपरिक्लेशसहाश्च भवन्ति; तद्यथा-बाह्लीक–सौराष्ट्रिकसैन्धव–सौवीरकास्ते हि पयसाऽपि सह लवणमश्नन्ति, येऽपीह भूमेरत्यूषरा देशास्तेष्वोषधिवीरुद्वनस्पतिवानस्पत्या न जायन्ते अल्पतेजसो वा भवन्ति, लवणोपहतत्वात्। तस्माल्लवणं नात्युपयुञ्जीतातिलवणसात्म्यानां पुरुषाणामपि खालित्यपालित्यानि वलयश्चाऽकाले भवन्ति** ( चवि. १.१८ )
मिठे पांच आहेत. ( १ ) सैंधव ( २ ) सौवर्चल

(३) बिडलोण (४) औद्भिद (५) सामुद्र. बिडलवणा ऐवजी काललवण काही मानतात. धूपनद्रव्यांपैकी लवण हे एक द्रव्य. निरूहबस्तीसाठी उपयुक्त द्रव्यांपैकी एक. शिरोविरेचनाकरता वापरतात. याशिवाय यामध्ये आणखी तीन मिसळली (कृष्ण, रोमक, पांसुज) ही अष्ट लवणे होतात. **खारट रस** गुण– विपाकाने मधुर तीक्ष्ण, मृदु, सूक्ष्म, अग्निबल वाढविणारा रुचकर, वातनाशक, कफपित्ताला व मळाला निर्माण करणारा, सैंधव सोडून बाकीची सर्व लवणे डोळ्याला अहितकारक आहेत. दुधाशी लवण वापरणे हे विरुद्ध आहे. लवणाचा अतियोग झाला तर शरिराला ग्लानि, शैथिल्य, दौर्बल्य, मांस, रक्तशैथिल्य, उत्पन्न होते. क्लेश सहन करण्याची शरिराची शक्ती कमी होते. डोक्याला अकाली टक्कल पडते, अंगावर वळ्या उत्पन्न होतात. पंजाबचे बाल्हिक व सौवीरक आणि सिंध, काठेवाड प्रांतीय लोक दुधाशी मीठ वापरतात. भारतात जे खाऱ्या भूमीचे प्रदेश आहेत, तेथे औषधी, वृक्ष, झाडे, वेली होत नाहीत, क्वचित होतात, ती हीनवीर्य असतात. याचे कारण त्यात लवणरसाधिक्य असते. म्हणून लवण फार वापरू नये.

**सैन्धवम्** (असंसू. ११; र. ११.२६) सैंधव.
**भैषज्य० लोणारक्षारः** (रा. ६.५३) लोणार क्षार.
**रस०** (सुउ. ६३.१६) **षड्रसेष्वेकः लवणरसः** (असंसू. १३)

खारट रस, सहा रसांपैकी एक रस.

**(लवणा)**–स्त्री., वनस्पति० **तेजोवती** (रा. ३.३९२)
मालकांगोणीप्रकार.

**–किंशुका**–स्त्री., वनस्पति० **तेजोवती** (रा. ३.३९३)
मालकांगोणीप्रकार.

**–क्षार**–न., क्षार० **लोणारक्षारः** (रा. ६.५३)
लोणारक्षार.

**–गण**–पु., **लवणस्कन्धः–सैन्धवं सौवर्चलं कृष्णलवणं बिडं सामुद्रमौद्भिदं रोमकं पांसुलवणं शीसं स्वर्जिकाक्षारश्च** (अहसू. १०.२७) **लवणस्कन्धः** (चवि. ८.१४१)
लवणवर्ग. (१) सैंधव (२) सौवर्चल (३) कृष्ण लवण (४) बिड (५) सामुद्र (६) औद्भिद (७) रोमक (८) पांसु (९) शीस (१०) स्वर्जिकाक्षार.

**–तृण**–न., तृण० गुणाः–**क्षाराम्लकषायं अश्ववृद्धिकरम्। स्तन्यवृद्धिकरम्** (रापरि० ८.५७)
लोणा गवत. गुण– खारट, आंबट, तुरट, अंगावरचे दूध वाढविणारे. घोड्याची वाढ करणारे.

**–तैल**–न., **लवणवत्तैलम्, लवणयुक्तम्** (चचि. १७.७१)
लवणतैल मिश्रण. मीठ घातलेले तेल.

**–द्वय**–न., **सौवर्चलं सैन्धवं च** (सुसू. २०५; सुक. ५.८२)
लवणद्वय. सैंधव व पादेलोण.

**–द्रव्यस्कन्ध**–पु., **लवणगणः** (असंसू. १८)
लवणगण, मिठाचा वर्ग.

**–नित्य**–वि., **नित्यं लवणरससेवी** (चशा. ८.२१)
नेहमी खारट खाणारे.

**–पञ्चक**–न., **पञ्चलवणानि– 'सैन्धवं रोमकं चैव सामुद्रलवणं तथा । बिडं सौवर्चलाख्यं च युक्तं लवणपञ्चकम्'** (ध. ७.५५)
पाच लवणे. सैंधव, रोमक, सामुद्र, बिड, आणि सौवर्चल.

**–प्रियता**–स्त्री., लक्षण० **लवणरसभूयिष्ठपदार्थाभिलाषः** (चनि. १.३३)
लवणरस अधिक असलेल्या पदार्थांची आवड.

**–भेद**–पु., क्षार० **लवणारम्** (रा. ६.५२)
लवणाचे प्रकार.

**–मेह**–पु., रोग० **मेहभेदः कफजमेहः, लक्षणम्– लवणमेहे लवणाम्बुतुल्यं विशदं मूत्रं भवति** (सुनि. ६.१०) **चिकित्सा–पाठागुरुहरिद्राकषाय उपयुक्तः** (सुचि. ११.९)
लवणमेह, मेहाचा एक प्रकार. ज्यात फार खारट पाण्यासारखी स्वच्छ लघ्वी होते. **उपचार**— पहाडमूळ, अगरू, हळद यांचा काढा.

**–यन्त्र**–न., यन्त्र० **वालुकायन्त्रवद्यन्त्रम् अत्र वालुकास्थाने लवणनिक्षेपः रसादिपचनार्थमुपयुक्तम्** (र. २.९२-९.३९)
लवणयन्त्र, वालुकायन्त्राप्रमाणे पारा इत्यादींचे पचन करण्यास उपयुक्त.

**–रस**–पु., रस० **षड्रसेष्वेकः** (सुसू. ४२.३) **तोयाग्निगुणबाहुल्याल्लवणरसस्य संभवः** (सुसू. ४२.३; असंसू. १८; चसू. २५.४०; असंसू. १३) **गुणाः– लवणः क्षार उष्णो गुरुः स्निग्ध आग्नेयश्च**

( सुसू. ४२.४-७ ) लवणरसो वातघ्नः प्रक्लेदिभावाद्वातस्य विबन्धं जयत्युष्णत्वाच्चैत्यं निहन्ति, गुरुत्वाल्लाघवं निहन्ति ( काखि. ६.३०-३१ ) मुखे क्षिप्ते स मुखं स्यन्दयति कपोलयोर्गले च दाहं करोति ( अहृसू. १०.४ ) लवणरसे निर्यासादिकल्पनानामसंभवः ( असंसू. १५; द्र० ' रस ')
लवण—खारट रस. सहा रसांपैकी एक. पाणी व अग्नि गुणाधिक्याने लवण रस उत्पन्न होतो. **गुण**— लवणरस वातनाशक आहे. प्रक्लेदिस्वभावामुळे वाताचा अवरोध नाहीसा करतो. उष्णत्वामुळे शैत्य नाहीसे करतो. गुरुत्वामुळे लाघव नाहीसे करतो. तो तोंडात घातला तर पाणी—लाळ सुटते, गालात व गळ्यात आग होते. लवण रसाचा काढा, चटणी इत्यादी कल्पना अशक्य आहेत.

**–वर्ग**–पु., लवणरसयुक्तद्रव्याणां संग्रहः ( सुसू. ४६.३१३; चवि. ८.१४१ )
लवण रसयुक्त द्रव्यांचा संग्रह.

**–षट्क**–न., सामुद्र–सिन्धु–रुचक–बिड-रोमक-पांशु-लवणानि समेत्य एतल्लवणषट्कम् ( ध. ७.६७ )
सहा लवणे. मीठ, सैंधव, पादेलोण, बीड, रोमक व जमिनीतील मीठ.

**–सात्म्यता**–स्त्री., भोजने लवणरसाभ्यधिकाभ्यासो रक्तप्रकोपकस्तैमिर्यादिविकारजनकः (काखि. ५.४४)
लवणरस फार खाण्याच्या सवयीमुळे रक्तप्रकोप तिमिर आदि डोळ्याचे विकार होतात.

**–स्कन्ध**–पु., लवणवर्गः ( चसि. ७.३१ ) स्कन्धद्रव्याणि–सैन्धवसौवर्चलकालविडपाक्यानूपकूप्यवालुकैलमौलकसामुद्ररोमकौद्भिदौषरपाटेयकपांशुजान्येवंप्रकाराणि चाऽन्यानि लवणवर्गपरिसंख्यातानि ( चवि. ८.१४१ )
लवणवर्ग, सैंधव, पादेलोण, काललवण, बिड, पाण्यात माती कालवून पाणी गाळून उकळून केलेले ते पाकी लवण, आडातील पाण्याचे, समुद्राचे, रुमा नदीचे इत्यादी निरनिराळ्या स्थानात होणारी मिठे.

**लवणाब्धिज**–न., लवण० सामुद्रलवणम् ( रा. ६.४२ )
समुद्राच्या पाण्यापासून झालेले मीठ.

**लवणाम्बु**–न., लवणजलम् कर्णस्रोतोगते कीटे कर्णं सुखोष्णेन लवणजलेन पूरयेत् ( अहृसू. २८.४२ )
मिठाचे पाणी; कर्ण मार्गात किडा गेल्यास कानात मिठाचे पाणी घालावे.

**लवणाम्बुधर**–पु., क्षारसमुद्रः ( असंशा. ३. )
खारा समुद्र.

**लवणार**–न., लवण० लोणारक्षारः, गुणाः–लवणं क्षारयुक्तमत्युष्णं तीक्ष्णं वातघ्नं पित्तकरं गुल्महरञ्च ( रा. ६.५३ )
लोणारक्षार–खार. लवण हे क्षारयुक्त अधिक उष्ण, तीक्ष्ण, वातनाशक, पित्तकर आणि गुल्मनाशक आहे.

**लवणासुरज**–न., लवण० लवणारम् ( लोणारक्षारः ) ( रा. ६.५४ ) लोणार क्षार.

**लवणास्यता**–स्त्री., लक्षण० मुखे लवणरसता ( अहृसू. २७.३; चसू. २४.१४ )
तोंडाची रुचि खारट असणे.

**लवणोक्ता**–स्त्री., वनस्पति० ज्योतिष्मती ( ध. १.२६७)
मालकांगोणी.

**लवणोत्तम**–न., सैन्धवम् ( सुउ. ५७.७; असंउ. ४३ )
सैंधव.

**लवणोत्थ**–न., लवण० लोणारक्षारः ( रा. ६.५३ )
लोणार खार.

**लवणोदधिसंभव**–न., लवण० सामुद्रम् ( ध २.३४ )
मीठ.

**लवलिका**–स्त्री., वृक्ष० लवली (र. २.६४) रायआवळी.

**लवली**–स्त्री., फलवृक्ष० घनस्निग्धा हरितांशुः प्रपुन्नाटसदृक्छदा सुगन्धिमूला पाण्डुकोमलवल्कला ( ड. सुसू. ४६.१८९ ) लवलीफलगुणाः–मधुरं अम्लं कषायं किंचित्तिक्तं गुरु रूक्षं रोचनं हृद्यं विशदम् । कफपित्तहरं वातलं । मूत्राश्मरी–अर्शोरोगहरम् अवदंशक्षमं हृद्यम् लवलीफलं प्राश्य द्रव्यान्तरे रुचिर्भवति ( चक्र. चसू. २७.१४५; सुसू. ४६.१८९ असंसू. ७ )

हिं.—हरपररेवडी.
**म.—काथआवळे, रायआवळे.**
गु.— खाटी आवळी.

लवली ( रायआवळी )–हिरवी व टाकळ्याच्या पानासारख्या पानांची, पांढरी व कोमल सालीची सुगंधी मुळाची घट्ट व स्निग्ध असलेली. फळाचे **गुण**—गोड, आंबट, तुरट, किंचित कडु, जड, रूक्ष, चवदार, हृदयाला हितकर, तोंड स्वच्छ करणारे, कफपित्तहारक, मूतखडा, मूळव्याध नाशक, वातुळ. चटणीला चांगला. हा खाल्ल्यानंतर दुसऱ्या पदार्थांचा स्वाद चांगला लागतो.

-**फल**-न., फल० लवल्याः फलम् ( असंसू. ७.)
रायआवळा.

**लशुन**-पु., न., कन्द० पञ्चभिः रसैर्युक्तो रसेनाम्लेन वर्जितः, तस्माद्रसोनः ( भाप्र. ) हरितवर्गोक्तं द्रव्यम् ( चसू. २७.१७६ ) गिरिजं क्षेत्रजं चेति द्विविधं लशुनम्, तत्र गिरिजं श्रेष्ठम् ( काक. ११४ ) शिरोविरेचनद्रव्येष्वेकम् ( चसू. २.५; सुसू. ३९.६ ) " लशुनो गुल्माऽनिलहराणां श्रेष्ठः " ( असंसू. १३ ) स्नेहौष्ण्य-गौरवैः वातं क्षपयति ( असंसू. १७ ) तस्य नित्योपयोगः- कृतान्नेषु संस्कारार्थमुपयोज्यः ( सुसू. ४६.२२१ ) रसायनार्थं पौषे माघे लशुनान्युपयोज्यानि ( काक. लशुनाध्याय. ३५ ) लशुनसेविनां मद्यं मांसम् आम्लं च हितम्। व्यायामाऽऽतपक्रोधअतिजलपानदुग्धगुडसेवन महितम् ( भा. प्र. ) सूतिकागर्भिणीशिशुषु आमज्वरे अतिसारे च कामलायां तृष्णाच्छर्दि-हिक्काश्वासाऽतिवृद्धिषु लशुनं न प्रयोजयेत् (का लशुनकल्पअ) लशुने रसविशेषः कन्देषु कटुकः, पत्रेषु तिक्तः, नाले कषायः बीजे तु मधुरः ( भा. प्र. ) तक्रे स्थापनेनास्य शुद्धिर्भवति ( र. २४.५ ) गुणाः-कटुः स्वादुरम्लः पाके कटुः उष्णो गुरुः पिच्छिलः, सुतीक्ष्ण उग्रगन्धः दीपनः पाचनः सरो रसायनः रक्तपित्तप्रदूषणः ( असंसू. ७.१६२-१६५ ) बल्यो वृष्यो मेधा-स्वर-वर्णकरः नेत्र्यः भग्नास्थिसन्धानकरः कफवातहरः अरोचक-कृमि-हृद्रोग-शोफ-जीर्ण-ज्वर-शूल-विबंध-गुल्म-कास-श्वास-मूत्रकृच्छ्र- श्वेतकुष्ठाऽर्शो-मेह-हिध्मा-पीनसहरः ( चसू. २७.१७६ः का. लशुनकल्प; अहसू. ६.१०९-१११; ध. ४.६६; रा. ७.९५; भा. प्र. ) आस्थापने कृमिहरः ( चवि. ७.१७ ) कुष्ठादिहरः प्रदेहे ( चसू. ३.४ ) अजाऽविमूत्रेण भावितोऽयम् आघ्रातः हिक्कां निहन्ति ( सुउ. ५०.२३ )
हिं.—लशुन, लसुन, लहशून, लहसन, कांदा.
**म.—लसूण, पांढरी, तांबडी लसूण.**
गु.—लसण.
बं.—लसुन-लशुन-रसून.
ता.—वळइपाण्डु, वळइपाण्डु.
फा.—सीर. ( शा. नि. )
एक कंद. अम्ल रसाखेरीज गोड इत्यादी ५ रस यात आहेत. म्हणून याला रसोन ( रस उणा ) म्हणतात. आहारात हिरवी-कच्ची खावयाची जी द्रव्ये त्यातील एक. प्रकार २. पर्वतात होणारा व शेतात होणारा. पहिला श्रेष्ठ. डोक्याचे रेचक करणारे. गुल्म व वात हारक द्रव्यांत श्रेष्ठ. स्निग्धता, उष्णता, जडपणा यांनी वातनाशक होतो. त्याचा नित्य उपयोग अन्नात संस्कार, फोडणी इ. मध्ये करतात. सर्व धातु पोषणाकरिता पौष व माघ महिन्यात योग्य विधीने देतात. लशुन सेवन करणारांना मद्य, मांस व अम्ल द्रव्ये हितकर आहेत. तर व्यायाम ऊन्ह, संताप, अतिजलपान, दूध, गूळ यांचे सेवन अहितकर आहे. बाळंतीण, गरोदर स्त्री, बालकांना तसेच आमज्वर, अतिसार, कावीळ, तहान, ओकारी, उचकी, श्वास, हे विकार अति वाढले असता लसूण देऊ नये. **स्थानानुरूप रस**— कंदात तिखट, पानात कडु, नळीत तुरट, बीजात गोड. ताकात ठेवला असता याची शुद्धि होते. **गुण**— तिखट, गोड, अम्ल, पचनानंतर तिखट, उष्ण, जड, बुळबुळीत, अतितीक्ष्ण, उग्रगंधी, दीपक, पाचक, सारक, बलवर्धक, शुक्र व नेत्र याना हितकर, धारणाशक्ति, स्वर, वर्ण वाढविणारा. अस्थिभंग सांधणारा. अरुचि, कृमि, हृद्रोग, सूज, जीर्णज्वर, शूल, विबंध, गुल्म, कास, श्वास, मूत्रकृच्छ्र, पांढरे कोड, मूळव्याध, प्रमेह, उचकी, पडसे, वात कफ हारक. शोधकबस्तीत कृमिहारक व लेपाने कुष्ठादि हारक. शेळी व मेंढीच्या मूत्राने भावना दिलेला लसूण वासाने उचकी नाहीशी करतो. लसूण रक्तपित्त वाढविणारा आहे.

-**यूष**-पु., यूष० लशुनस्य यूषः, स वातनाशकः ( काखि. ४.६४ )
लसुणाचे कट, कढण. हे वातनाशक आहे.

**लसत्फल**-पु., धान्य० खस्तिलः ( ध. ६.१२० )
खसखस.

**लसिका**-स्त्री., व्रणगतमुदकम्, लसीका (अहसू. ३०.४५)
लस. व्रणातून पाझरणारा द्रव.

**लसीका**-स्त्री., शरीरान्तर्गतपिच्छिलद्रव० ( चसू. २६.४३(५) शरीरस्य जलस्य पिच्छिलो भागः ( चसू. २०.८ ) यत्तु त्वगन्तरे व्रणगतमुदकं तत् लसीकाशब्दं लभते ( चशा. ७.१५ ) त्वगाश्रयो जलप्रायो रसमलः ( अहसू. १२.२ ) 'रसस्य...मलः कफः लसीका च' ( असंशा. ६ )

**अवगाढपूयलसीकासु...मांसदाहः** ( असंसू. ४० ) लस, शरिरातील जलाचा बुळबुळीत भाग. त्वचेच्या मधील व्रणातून जे पाणी स्रवते ते लसीका. त्वचेच्या आश्रयाने राहणारा रसाचा जो जलप्राय मल तो लस. ज्या ठिकाणी खोल पू व लस वहात असेल अशा व्रणात मांसापर्यंत डाग द्यावा.

**लाक्षा**–स्त्री., **भैषज्य० रञ्जकद्रव्यम्** ( सुसू. ३९.६ ) **इयं कृमिजा** ( ध. ३.८२ ) **सालपलाशादिनिर्यासः** ( सुसू. १४.३६ ) **सद्यःक्षते रक्तस्रावपरिहारार्थमवचूर्णनद्रव्यम्** ( असंसू. ३६ ) **'लाक्षा सद्यःक्षतघ्नानां श्रेष्ठा'** ( असंसू. १३ ) **लाक्षादिगणेष्वेकं द्रव्यम्** ( सुसू. ३८.६४-६५ ) **कुष्ठेष्वालेपनार्थमुपयुज्यते** ( सुचि. ९.१० ) **गुणाः– तिक्ता कषाया ( मधुरा ) उष्णा ( शीता )** ( भा. प्र. ) **स्निग्धा ( दुष्टव्रणविशोधनी )** ( सु. ) **कफपित्तघ्नी, रक्तपित्तकृमिव्रणरक्तदोषविषमज्वरभूतज्वरहरा** ( ध. ३.८२ )

हिं.—लाख, लाही.

**म.—लाख.**

गु.—लाख.

बं.—लाहा.

ता.—अरक्कु.

फा.—लाक.

रंगाचे द्रव्य. ही कृमिज. साग पळस इत्यादींचा डिंक, जखम होताच रक्तस्राव थांबण्याकरिता चूर्ण दाबावे. जखम नाहीशी करणाऱ्या द्रव्यांत श्रेष्ठ. लाख इत्यादी गणातले एक द्रव्य; कुष्ठात लेपाकरिता. **गुण**– कडु, तुरट, गोड, उष्ण, स्निग्ध, दुष्टव्रणाची शुद्धि करणारी, रक्तपित्त, कृमि, व्रण, रक्तदोष, विषमज्वर, भूतज्वर हारक, कफ पित्त नाशक.

**–कृत्य**–न., **पादतलयो रञ्जनात्मकं लाक्षाकर्मानुष्ठानम्** ( र. १.११.१५ )

पायांवर लाखेच्या साह्याने रंगीत नक्षी करणे.

**–प्रसाद**–पु., **वनस्पति० शाबरलोध्रः** ( ध. ३.१७७ ) लोध्र.

**–प्रसादन**–पु., **वनस्पति० क्रमुकः शाबरलोध्रः** ( ध. ३.१७७ )

तांबडा रोध्र. सुपारी.

**–रस**–पु., **योग० लाक्षानिःसृतो द्रवो रसः, लाक्षाजलम्, लाक्षाक्वाथः** ( सुशा. २.१७ ) **लाक्षारससाधनविधिः–दोलायन्त्रे षड्गुणे जले लाक्षाद्रव्यम् उत्क्वाथ्य त्रिसप्तधा परिस्राव्य लाक्षारसं साधयेत्** ( वैश. सिं. )

( सुचि. २५.२६ ) **क्षतक्षीणे लाक्षारससिद्धं क्षीरं लाक्षादिसिद्धं घृतं वा प्रशस्तम्** ( चचि. ११.३४ ) लाखेचा पातळ रस. लाखेचे पाणी–काढा.

**लाखेच्या रसाची कृती**—लाखेच्या सहापट पाण्यात ती दोलायंत्रात घालून उकळावी व नंतर २१ वेळा कपड्याने गाळावी. **उपयोग**—उरःक्षताने क्षीण असणारास लाखेच्या रसाने सिद्ध दूध किंवा तूप चांगले.

**–वृक्ष**–पु., **वृक्ष० क्षुद्राम्रः ( कोशाम्रः )** ( ध. ५.९ ) कोवळा आंबा, चिकाळा आंबा, जंगली आंबा.

**लाक्षोदक**–न., **औषधकल्प० लाक्षादिगणक्वाथः नाडीव्रणेषु दोषापनयनार्थमुपयुज्यते** ( सुचि. १७.३७ ) लाख इत्यादी गणाचा काढा नाडीव्रणावर दोषनाशाकरिता उपयुक्त.

**लाघरक**–पु., **रोग० पाण्डुरोगभेदः** ( सुउ. ४४.६ ) **कुंभकामलायाः अवस्थान्तरेण संज्ञान्तरम्; अस्य अलसक इत्यपि संज्ञा। लक्षणानि–ज्वराङ्गमर्द–भ्रम–साद–तंद्रा–क्षयाः इति** ( सुउ. ४४.१२ ) **चिकित्सा–द्राक्षा गुडूच्यामलकीरसैः सिद्धं घृतं लाघरकाख्यपाण्डोः शमनम्** ( सुउ. ४४.३६ ) पांडुरोगाचा एक प्रकार. कोष्ठातल्या काविळीच्या एका अवस्थेचे नाव. याला अलसक असेही म्हणतात. **लक्षणे**—ज्वर, अंगमर्द, भ्रम, अंग गळणे, झापड व क्षय. **उपाय**—द्राक्षे, गुळवेल, आवळा, यांनी सिद्ध तूप चांगले.

**लाघव**–न., **लक्षण० लघुता गुरुत्ववैपरीत्यम्** ( चसू. १६.५ )

हलकेपणा, गुरु गुणाच्या उलट.

**शीघ्रक्रियता** ( चसि. ३.१९ )

चपळतेने क्रिया करणे.

**लाघवक**–पु., **रोग० लाघरकः** ( सुउ. ४४.६ )

पांडुरोगाचा एक प्रकार.

**लाङ्गल**–पु., **धान्य० शालिभेदः द्र० 'शालि'** ( चचि. १४.९५; अहृसू. ६.३ ) एकप्रकारची साळ.

न., **कृषि यन्त्र० कृष्युपयोगि हलम्** (सुक. ४.२२) नांगर.

**वनस्पति० कलिकारी** ( सुचि. ९.५५ ) कळलावी.

**( लाङ्गली )**–स्त्री., **वनस्पति० कलिकारी** (सुचि. २५.१९; असंशा. ३.२०; र. १२.१०१ ) कळलावी.

**इन्द्रपुष्पिका** ( इन्दु ) ( असंसू. ७.१४६ )
करंजवृक्षाचा प्रकार.
**महाराष्ट्री** ( रापरि. ४.१२ ) मराठी.
**नारिकेलः** ( ध. ५.७४ ) नारळ.
**ऋषभकः** ( रा. ५.१५८ ) अष्टवर्गांपैकी एक वनस्पती.
**जलपिप्पलिका** ( धा. ४.६४ ) जलपिंपळी.

**लाङ्गलक**–पु., **कृषियन्त्र० लाङ्गलम्** (सुचि. ८.१०) नांगर.
पु., **छेद० पार्श्वद्वये छेदः** ( असंउ. ३३ )
दोन्ही पार्श्वांवर घेतलेला छेद.
**वनस्पति० कन्दविषपरिगणितानामेकतमः** द्र० ' **कंदविष** ' असंउ. ४० )
कंदविषांपैकी एक विषारी कंद.
**कलिकारी** ( चचि. ७.१०९ ) कळलावी.

( **लाङ्गलकी** )–स्त्री., **वनस्पति० कलिकारी** ( सुचि. २०.४ ) कळलावी.
**शाक० गुणाः– तिक्तं अम्लं, कटु शकृद्भेदि च** ( चसू. २७.१०८ )
भाजीचे गुण–कडू, आंबट, तिखट, मलभेदक.

( **लाङ्गलिका** )–स्त्री., **वनस्पति० कलिकारी** (असंसू. ३९)
कळलावी.
–**च्छेद**–पु., **हलसदृशः छेदः, ' द्वाभ्यां समाभ्यां पार्श्वाभ्यां छेदो लाङ्गलको मतः '** ( सुचि. ८.१० )
दोन्ही सारख्या बाजूंकडून घेतलेला छेद. ( असा भगंदरात घ्यावा लागतो.

**लाङ्गलाह्वया**–स्त्री., **वनस्पति० कलिकारी** ( सुसू. ३७.१३ ) कळलावी.

**लाङ्गलिनी**–स्त्री., **वनस्पति० कलिकारी** ( रा. ४.१७ )
कळलावी.

**लाङ्गली**–स्त्री., ( सुचि. २५.१९ ) कळलावी.
–**मूल**–न., **कलिकारिमूलम्** ( असंशा. ३ )
कळलावीचे मूळ.

**लाङ्गल्या**–स्त्री., **वनस्पति० कलिकारी** ( ध. ४.९ )
कळलावी.

**लाङ्गुल**–पु., **धान्य० शालिभेदः** द्र० ' **शालि** ' ( चसू. २७.८ )
एक प्रकारची साळ ( भात ).

**लाङ्गूलिका**–स्त्री., **वनस्पति० पृश्निपर्णी** (रा. ४.११७)
पिठवण.

**लाङ्गूली**–स्त्री., **वनस्पति० कपिकच्छूः** ( सुसू. १९.२९; ध. १.१५१ )
खाजकुहिली.

**लाज**–पु., लाजाः ( असंसू. १५ ) भाताची लाही.

**लाजाः**–पु., **आहारद्रव्य० व्रीहिविकारः** ( चसू. २.२४ ) **पुष्पितं धान्यम्, भर्जिततण्डुलादिधान्यम्** ( सुउ. ५०.२६ ) **ये के च व्रीहयो भृष्टास्ते लाजा इति** ( रापरि. १६.८ ) **शोणितस्थापनगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१८; असंसू. १५ ) **छर्दिनिग्रहगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१४; असंसू. १५ ) **' लाजाश्छर्दिघ्नानां श्रेष्ठाः '** ( असंसू. १३ ) **दाहप्रशमनगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१७; असंसू. १५ ) **व्रीहि–विकाराणां लाजानां पिपासाघ्नपेयायामुपयोगः** ( चसू. २.२४ ) **गुणाः–मधुराः कषायमधुरा** ( सुसू. ४६.४१३ ) **शीता लघुरूक्षा दीपनाः स्वल्पमूत्रमला बल्याः पित्तकफघ्नाश्छर्द्यतीसारदाहरक्तरोगप्रमेहमेदस्तृष्णा-हराः कासघ्नाश्च** (अहसू. ६.३६; भाप्र. १२.१७५) **गुरुपित्तलात् व्रीहेः संस्कारात् जाताः लाजाः लघुपित्तहरा भवन्ति** ( असंसू. ७ )
भाताची लाही. फुलवलेले धान्य. भाजलेले तांदूळ इत्यादी धान्य. रक्तस्राव बंद करणाऱ्या द्रव्यांपैकी एक. ओकारी थांबवणारा. दाहनाशकगणातील एक द्रव्य. ओकारीनाशक द्रव्यात श्रेष्ठ. तृष्णाशामक पेजेत लाह्यांचा उपयोग होतो म्हणून पेज द्यावी. **गुण**—लाही गोड, तुरटगोड, थंड, हलकी, रूक्ष, दीपक, मूत्र व मळ थोडा उत्पन्न करणारी, बलवर्धक, पित्तकफ नाशक, ओकारी–अतिसार–दाह–रक्तरोग प्रमेह–मेद–तहान–खोकला नाशक. जड व पित्त-वर्धक व्रीही तांदळाच्या लाह्या सुद्धा ( संस्काराने भाजल्याने ) हलक्या व पित्तहर होतात.

( **लाजा** )–स्त्री., **लूता० सप्तसु उपपादिकाख्यासु लूतासु एका** ( असंउ. ४४ ) द्र० ' **लूता** '
उपपादिका इ० सातलूतांपैकी एक.
–**गन्धि**–वि., **लाजा इव गन्धः यस्य तत्** ( **ओजः** ) ( चसू. १७.७५ )
लाह्यासारखा गंध असणारे. ( ओज )
–**चूर्ण**–न., **लाजानां चूर्णम्** ( चचि. ४.३४ )
लाह्यांचे चूर्ण–पीठ.
–**तर्पण**–न., **योग० लाजसक्तुकृततर्पणविशेषः ज्वरे रक्तपित्तरोगे च बलरक्षणार्थं साधित–पेय–द्रव्यम्** ( असंचि. १ ) **विषज–तृष्णायां पाने सशर्करं लाजतर्पणमुपयुक्तम्** ( असंउ. ४७ ) **तत्र निर्माण-**

**विधिः—लाजान् सक्तून् वा स्वच्छजले किंचित् कालं स्थापयित्वा मृदुभूतान् तान् विमृद्य वस्त्रात् गालितं यद् द्रवं द्रव्यं तदेव लाजतर्पणं भवति**

लाह्यांचे तरवणे. ताप, रक्तपित्तविकारात शक्तिटिकविण्यासाठी योजलेले पातळ द्रव्य. विषज तहानेत साखर युक्त द्यावे. लाह्या किंवा सातू (भाजलेले जव) स्वच्छ पाण्यात काही काळ ठेवून मऊ झाल्यावर कुसकरून फडक्याने गाळलेले पाणी लाह्यांचे तरवणे यालाच शास्त्रात लाजतर्पण म्हणतात.

**तद्गुणाः—तृष्णातीसारशमनः धातुसाम्यकः दाहमूर्च्छानिवारणः** ( चसू. २७. २५४ )

गुण—तहान, अतिसार शामक. धातूचे साम्य करणारा व दाह मूर्च्छानाशक.

**—मण्ड**—पु., **मण्ड० कृतान्न० पेयाया उपरितनो भागो मण्डः** ( ड. सुसू. ४६.३४२ ) तद्गुणाः- **ईषद् पिप्पलीनागरयुतः सुसंस्कृतो लाजमण्डः पाचनो दीपनो वातानुलोमनो हृद्यश्च भवति** ( सुसू. ४६. ३४०-३४१ )

मंड म्हणजे लाह्यांच्या पेजेचा वरचा भाग. पेज करताना थोडी पिंपळी व सुंठ टाकावी. असा हा संस्कारित मंड पाचक, दीपक, हृदयाला हितकर, वात सरविणारा असतो.

**—वर्णा**—स्त्री., **लूता० उपपादिकाख्या तु लूतास्वेका** ( असंउ. ४४ ) **दंशलक्षणम्—दंशे ध्यामं पूतिरक्तं स्रवेत्, दाहो मूर्च्छाऽतिसारः शिरोदुःखं च जायते, असाध्यश्च** (सुक. ८.१२३ ) **अतिरुक् शीतज्वरश्च भवति** ( असंउ. ४५ ) द्र० 'लूता'

सात लूतांपैकी एक. हिच्या दंशाने व्रणातून लाल काळा दुर्गंधी स्राव होतो. दाह, मूर्च्छा, अतिसार, डोकेदुखी होते, वेदना फार, हिवताप येतो. हा असाध्य होय.

**—सक्तु**—पु., **कृतान्न० गुणाः—कषायो—मधुरः शीतो लघुश्च** (चसू. २७.२५७ )

लाह्यांचे पीठ. तुरट गोड थंड व हलके.

**लाजादितोय**—न., **औषधयोग० लाजोत्पलोशीरकुचंदनानि दत्त्वा तोयं प्रवाते निशि वासयेत्तत् सुगंधि पुष्पाधिवासितं शर्कराक्षौद्रयुक्तं जलं द्राक्षा-प्रगाढं क्षतजतृष्णाशमनार्थं पाययेत्** ( सुउ. ४८.२४-२५ )

औषधियोग—लाह्या, कमळ, वाळा, रक्तचंदन, ही द्रव्ये रात्रभर उघड्यावर पाण्यात ठेवावी, त्यांना सुगंधिफुलांनी सुवासित करून साखर मध व मनुका मिश्र करून उरःक्षती रोग्याला तहान शमण्यासाठी पिण्याला ते पाणी द्यावे.

**लाञ्छन**—पु., **तृणधान्य० रागी** ( रा. १६.१७८ )

नाचणी.

न., **रोग० क्षुद्ररोगः, लक्षणम्—शरीरे कृष्णं सितं वा सहजं मण्डलम्** ( असंउ. ३६ )

लासे, लांछन; शरिरावर काळे किंवा पांढरे जन्मतः असणारे मंडळ.

**लाटपर्ण**—न., **वनस्पति० त्वक्** ( ध. २.५० ) दालचिनी.

**लामज्जक**—न., **वनस्पति० उशीरभेदः** ( सुसू. ३९.९ ) **दाहत्वग्दोषस्वेदापनयनप्रलेपनानां श्रेष्ठम्** ( चसू. २५.४०; असंसू. १३.३ ) **गुणाः—तिक्तं—शीतलं, लघु** ( भा. प्र. ) **सगन्धम् त्रिदोषहरम्** ( **भा. प्र.** ) **विषत्वगामयमूत्रकृच्छ्रदाहहरम्** ( **भा. प्र.** ) ( चसू. ३.२९; ध. ३.८६ )

हिं.—लामज्जक.

**म.—पिवळा वाळा, लावज.**

गु.—पिळो वाळो सुगन्धिपिलू, खडजल जलवाळो.

बं.—करन्कुस गन्धवर्णा.

वाळाप्रकार. पिवळा वाळा. दाह, त्वचेचे दोष नाहीसे करण्यास व घाम कमी करण्यास उपयुक्त. लेपाच्या द्रव्यात श्रेष्ठ. **गुण**—कडू, थंड, सुगंधी, त्रिदोषहारक; विष व मूत्राचा त्रास नाहीसे करतो.

**पर्वतोद्भवमूलम्** ( सुउ. ४७.५८ )

पर्वतात उत्पन्न होणारी वाळ्याची जात.

**लालन**—पु., **मूषिक० तद्दष्टलक्षणानि—लालास्रावो हिक्काच्छर्दिश्च** ( सुक. ७.१० ) **मूर्च्छा** (असंउ. ४६) **चिकित्सा—सामान्यचिकित्सितं दोषप्रत्यनीकं सामान्यमूषकप्रतिकारवत् कर्तव्यम् व्याधिप्रत्यनीकं चिकित्सितं—तण्डुलीयककल्कः समाक्षिको लेह्यः तप्तघृतदग्धस्य दंशस्य विस्रावणं विधेयम्** ( सुक. ७.१०-११ )

एका जातीचा उंदीर. हा चावल्यामुळे लाळ गळणे, उचकी, ओकारी व मूर्च्छा ही चिन्हे उत्पन्न होतात. उपचार— उंदीर चावल्यावरची दोषानुसार सर्व चिकित्सा. तांदुळजाची चटणी मध घालून चाटावी. तापलेल्या तुपाने व्रण जाळून स्राव होऊ द्यावा,

**लालस**–वि., लालसायुक्तः, अभिलाषुकः
( सुसू. ४५.२०७ )
आसक्त, हावरा, अधाशी.

**लाला**–स्त्री., शारीरभाव० मुखे **स्रावस्वरूपोऽयम्, अस्य प्रस्रवणं मुखे भवद् बोधककफव्यपदेश्यम्**
( चनि. ८.६ )
लाळ–मुखातून होणारा स्राव, बोधक कफ या नावाने ओळखला जातो.

**–मेह**–पु., रोग० प्रमेहभेदः ( चसू. १९.४(९) ) **कफजोऽयम्, तल्लक्षणम्–पिच्छिलं तन्तुबद्धमिव मेहति** ( असंनि. १० ) द्र० '**प्रमेह**'
लालामेह—प्रमेहाचा प्रकार. कफज प्रमेहांपैकी एक. लक्षण– बुळबुळीत तंतुयुक्त अशी लघ्वी होते.

**–विष**–वि., **लालायाम् विषं यस्य, सः** ( लूतादिः ) ( सुक. ३.५ ) द्र० '**विष**'
ज्यांच्या लाळेत विष आहे असे प्राणी.

**–स्रवण**–न., लक्षण० लालास्रावः ( कासू. २५.८ )
लाळेचा स्राव. लाळ गाळणे.

**–स्राव**–पु., लक्षण० लालायाः स्रावः ( चसि. ९.६ )
लाळेचा स्राव.

**लालालुः**–वि., लक्षण० **बहुलालायुक्तः**
( चचि. ३०.२४७ )
ज्याची लाळ फार गळते तो.

**लाव**–पु., पक्षि० ( चसू. ६.२५ ) **स्थलचरः विष्किर-वर्गीयः** ( सुचि. ८.१३;अहसू. ६.४४ )
जाङ्गलः ( सुसू.२०.५ )
**चित्रयोधी** ( हेमाद्रि. अहसू. ६.४४ )
हिं.—लवा.
**म.—लावा पक्षी.**
बं.—लाअुया. बाँटा, लाओया पारवी.
( चसू. २७.४७ ) **लावः चतुर्विधः गौरकः, पांशुलः पौण्ड्को दर्भश्च** ( ड. सुसू. ४६.६०; ध. ६.४६० ) **अस्य मांसं शशसमानगुणकं वर्तते** ( असंसू. ७ ) **पक्षिमांसेषु श्रेष्ठतमम्** ( चसू. २५.३८ ) **मांसगुणाः–मधुरं कषायं शीतं स्निग्धं लघु हृद्यं पथ्यं दीपनं त्रिदोषघ्नं ग्राहि संनिपातज्वरे प्रशस्तम्** ( ध. ४.४६०; चसू. २७.६९; सुसू. ४६.६० ) **प्रकारभेदेन गुणाः– गौरकः–कफवातघ्नः, रूक्षोऽग्निदीपनः; पांशुलः– श्लेष्मलः, वीर्योष्णो वातहरः; पौण्ड्रकः–पित्तकृत्कफ-वातहरो लघुः; दर्भरः–रक्तपित्तघ्नः, हिमः, हृद्रोगहरः** ( ध. ६.४६१-६३ )
लावापक्षी–उकरून भक्ष्य वेचणारा, रूक्ष देशातील पक्षी; प्रकार चार. वर आहेत. सशाच्या गुणासारखे गुण. याचे मांस पक्ष्यांच्या मांसात श्रेष्ठ. गोड, तुरट, थंड, स्निग्ध, हलके, हृदयाला हितकर; त्रिदोषनाशक, दीपक, मळ बांधणारे, त्रिदोषज ज्वरात प्रशस्त. ( १ ) **पांसुल** लाव पक्ष्याचे मांस फार– कफकर, उष्ण, वातहर. ( २ ) **गौरक**–लावाचे मांस कफवात नाशक, रूक्ष, अग्निदीपक. ( ३ ) लावापक्षी–पौंड्रक पित्तकर, कफवात हारक, हलका ( ४ ). **दर्भर**– रक्तपित्त नाशक, थंड, हृद्रोगहारक.

**( लावा )**–स्त्री., पक्षि० लावः ( रा. २०.४७९-८० )
लावा पक्षी.

**लावक**–पु., पक्षि० लावः ( र. २७.४९-५१ ) लावा.

**–पुट**–न., पुट० **संपुटितशरावाकारमूषां भूमौ निधाय षोडशिकामात्रैः पलमानैः वन्योपलैस्तन्मानैस्तुषैर्वा दीयमानं पुटम् । मृदुद्रव्यसाधनार्थमुपयोज्यमिदम्**
( र. १०.६४ )
रानशेण्यांचा ४ तोळे चुरा किंवा तेवढेच तूस यांचे पुट अतिमृदु द्रव्यांचे पचन करण्यासाठी उपयुक्त.

**लावकीयूष**–पु., कृतान्न० **लावमांसरसेन कृतो यूषः**
( सुउ. ४२.९३ )
लावा पक्ष्याच्या मांसाचा रस घालून केलेले कढण.

**लावण**–पु., लवणसमूहः ( सुक.५.८१ ) लवणांचा समूह.

**–क्षार**–पु., योग० **ज्योतिष्मत्याः क्षारः, स च लौह-रसायने उपयुक्तः** ( चचि. १(३).१५ )
मालकांगोणीचा क्षार. हा लोहाच्या रसायनात उपयोगी.

**लावण्य**–न., रूपातिशयः ( ड. सुसू. ४५.९६ ) सौंदर्य.

**लावाक्षक**–पु., धान्य० व्रीहिभेदः लावाऽक्षिसदृशतण्डुलः ( सुसू. ४६.१२ ) द्र० '**व्रीहि**'
तांदळाचा एक प्रकार. लावा पक्ष्याच्या डोळ्यासारखा दिसणारा तांदूळ.

**लावाख्य**–वि., धान्य० व्रीहिभेदः लावाक्षकाः
( अहसू. ६.९ ) द्र० '**व्रीहि**'
व्रीही. तांदळाचा प्रकार.

**लासिनी**-स्त्री., सर्प० निर्विषः ( असंउ. ४१ ) द्र० 'सर्प' निर्विष सर्पाचा प्रकार.

**लिकुच**-पु., वनस्पति० लकुचः ( चसू. ४.१०; रापरि. ९.४४ ) **हृद्यगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१०; असंसू. १५ ) **फलानामवरत्वेन लिकुचं सर्वदोषकृत्** ( असंसू. ७ )
ओट, उंडे, ओटीफळ, क्षुद्रफणस. हृदयाला हितकर, एक द्रव्य. फळात कनिष्ठ व सर्व दोष करणारे.
न., शाक० **चुक्रम्** ( रापरि. ७.६४ ) चुका, आंबाडा.

**लिक्षा**-स्त्री., केशक्रमि० **केशक्रमेर्यूकाया अण्डम्** ( रापरि. १९.३२ ) **लिक्षा** ( असंनि. १४; र. २४.८१ )
लिखा, उवांची अंडी; केसातील क्रमि.
**मान० षट्त्रुटिमानम्** ( र. ११.१ ) एक प्रमाण.
सहा अणु म्हणजे एक त्रुटि. सहा त्रुटि म्हणजे लिक्षा.

**लिङ्ग**-न., शारीर० **मेढ्रम्** ( सुनि. १४.३ ) **उपस्थम्** ( र. २५.१६ )
पुरुषजननेंद्रिय. शिश्न.
**लक्षणम्, चिह्नम्, 'हेतुलिङ्गौषधज्ञानं स्वस्थातुरपरायणम्'** ( चसू. १.२४ ) **तत्पर्यायाः-आकृतिर्लक्षणं चिह्नं संस्थानं व्यञ्जनं रूपमिति** ( चनि. १.९; असंनि १; चनि. १.६ )
स्वस्थ किंवा रोगीअवस्थेचे लक्षण. लक्षण-पर्याय वर आहेत.

**-ग्राह्य**-वि., **अनुमानग्राह्यम्** ( चशा. १.६२ )
अनुमानाने ग्राह्य, कळणारे.

**-जा**-स्त्री., वनस्पति० **लिङ्गिनी** ( रापरि. ३.१७ )
शिवलिंगी.

**-नाश**-पु., नेत्ररोग० **दृष्टिनाशः** ( सुउ. १७.५५ ) **लिङ्गं चक्षुरिन्द्रियशक्तिस्तस्य नाशो यस्मिन्, स लिङ्गनाशदोषः** ( ड. सुउ. ७.१५-१६ ) **लिङ्ग्यते ज्ञायतेऽनेनेति लिङ्गशब्देन दृष्टिरुच्यते, तस्य नाशो लिङ्गनाशः।-आढमल्लः, चतुर्थपटलगतदोषलक्षणम्-तिमिरस्य हेतुभूतो दोषो चतुर्थं पटलं गतः सन् सर्वतो दृष्टिं रुणद्धि, स लिङ्गनाश उच्यते। तत्राऽल्पेषु दोषेषु केषाञ्चिद्वस्तुविशेषाणामुपलम्भो भवति यथाऽन्तरिक्षे चन्द्रादित्यौ नक्षत्राणि विद्युतो निर्मलानि तेजांस्यग्न्यादीनि दीप्तिमन्ति यानि अन्यान्यपि वस्तूनि तानि पश्यति** ( सुउ. ७.१५-१७ ) **लिङ्गनाशो नीलिकाकाचसंज्ञितः** ( सुउ. ७.१८ )
दृष्टीचा नाश. लिंग म्हणजे दृष्टि. डोळ्याची शक्ति. तिचा नाश ज्यात होतो तो रोग. जिच्याने लिंग्यते म्हणजे जाणले जाते ती दृष्टि. त्या लिंगाचा-दृष्टीचा नाश तो लिंगनाश, तिमिर रोगाला कारणीभूत प्रकुपित दोष चवथ्या पडद्यात जाऊन सर्व बाजूंनी दृष्टि अडवतात, त्यास दृष्टिनाश म्हणतात. जर थोडे दोष असले तर काही विशेष वस्तू दिसू शकतात, जसे आकाशात चंद्र, सूर्य, नक्षत्रे, विजा चमकणे, निर्मल तेज, तेजस्वी अग्नि इत्यादी अशाच अन्य तेजस्वी वस्तूही तो पहातो. काचबिंदु किंवा निळी असेही याला म्हणतात.

नेत्ररोग० **दृष्टिमण्डलगतः, नीलिकापटलमान्ध्यमिति पर्यायः**- ( असंउ. १७ ) **दृष्टिमण्डलं मसूरदलमात्रं पञ्चभूतप्रसादजम्** ( सुउ. ७.३ ) **दृष्टिमण्डल० 'सङ्कुचत्यातपेऽत्यर्थं छायायां विस्तृतं भवेत्। मृद्यमाने च नयने मण्डलं तद्विसर्पति,'** (सुउ. ७.३१-३२ ) **लिङ्गनाशः कफोत्थं पटलम्** ( अरु. अहृसू. २६.१३ ) **सम्प्राप्तिः- दोषो दृष्टिमण्डलं छादयेत्** ( असंउ. १५ ) **संख्या-लिङ्गनाशः सप्तधा स्यात्-वातात्पित्तात्कफेन त्रिदोषैरुपसर्गेण संसर्गेणाऽस्रजा च** ( शार्ङ्ग. प्र. ७.१६५-१६६ )

**तस्य षड्विधत्वं मण्डलरागभेदेन-वाताद्दृष्टिमण्डलमरुणं चञ्चलं परुषं च भवति। पित्तान्नीलं कांस्याभं पीतञ्च। श्लेष्मणा बहुलं स्निग्धं शङ्खकुन्देन्दुपाण्डुरम्। त्रिदोषजे तु चित्रवर्णम्। रक्तजं शोणितात्मकं स्थूलकाचारुणप्रभं प्रवालपद्मपत्राभं च भवति।** ( शार्ङ्ग. प्र. ७.१६५ ) **संसर्गजे सङ्कीर्णलक्षणम्** ( असंउ. १५ ) **आगन्तुलिङ्गनाशस्य लक्षणम्-अल्पसत्त्वस्य सहसैव भास्करादेस्तेजस्विरूपं पश्यतो नयनाश्रिता वाताद्या दर्शकं तेजः संशोष्य दृष्टिं मुषितदर्शनां वैदूर्यवर्णां स्तिमितामव्यथां प्रकृतिस्थामिव कुर्वन्ति। अयमौपसर्गिक आगन्तुको लिङ्गनाशः** ( असंउ. १५ ) **तदुपद्रवाः षट्-आवर्तकी शर्करा, राजीमती, छिन्नांशुका, चन्द्रकी, छत्रकी चेति। क्रमेण लक्षणानि-श्वेतारुणाऽऽवर्तवदनवस्थिता चला च। अर्कक्षीरलेशेनेव कूर्चिकापिण्डेनेव चाऽऽचिता नाम व्याप्ता। शालिशूकाऽऽभराजिभिरावृता। अन्तराऽन्तरा विच्छेदयुक्ता विषमसंस्थानदग्धप्रतीतियुक्ता रुजासहिता दृष्टिः। कंसलोहसमच्छाया मयूरबर्हाग्राऽऽकारा।**

अनेकवर्णा किञ्चिदुन्नतत्वाच्छत्रसदृशी (असंउ.१७) साध्यासाध्यत्वम्—वातपित्तरक्तसंसर्गसन्निपातोपसर्गजाः षडसाध्याः, कफज एव साध्यः (इन्दु. असंउ. १५; सुउ. ७.३३) असौ कफजोऽपि उपद्रवरहितश्चेत्साध्यः (असंउ. १७)

चिकित्सितम्—यद्यर्धेन्दाकृतिर्बुदुक्ताफलसदृशाकृतिः प्रस्वेदबिन्दुसदृशाकृतिः कठिनो निम्नोन्नतो राजिमान् बहुप्रभः सरुजः सलोहितस्तत्र शस्त्रकर्म न कुर्वीत (सुउ. १७.५५-५६) सिराव्यधकर्मनिषिद्धानां तृट्पीनस-कासिनामजीर्णभीरुवमितशिरःकर्णाक्षिशूलिनामत्युष्णशीतवाताभ्रेऽसम्पूर्णं लिङ्गनाशं न विध्येत् (असंसू. १७) शस्त्रकर्मविधानम्—यतः श्लैष्मिकलिङ्गनाशो दृष्टिमण्डलाऽऽश्रितश्लेष्मसंहत्या भवति तस्माच्छ्लेष्मसंहतिविश्लेषार्थं शलाकाऽग्रेण दृष्टिमण्डलं निर्लिखेत् (सुउ. १७.६३) सा ताम्रमयी सुवर्णमयी वा कर्कशादिदोषरहिताऽष्टाङ्गुलायता मध्ये सूत्रेण परिवेष्टिताऽङ्गुष्ठपर्वसंमिता स्यात् (सुउ. १७.८३-८५) सा द्विमुखी मुखे कुरण्टकमुकुलाकृतिश्च स्यात् (अहसू. २६.१३) शस्त्रकर्मस्थानमासनं रुग्णस्य च—निराबाधे धूलिधूमवातातपादिरहिते गृहे उत्तान एव शयीत तत्र शस्त्रकर्मकाले यावच्छलाका नेत्रे तिष्ठति, तावत्कालं उद्गारकासक्षवथुष्ठीवनोत्कम्पनानि नाचरेत् (सुउ. १७.६७-६८) शस्त्रकर्मविधिः स्निग्धस्य यथा विरिक्तस्य घृतैः सम्भोजितस्य निशि रसेन प्रीणितोत्तमाङ्गस्याऽभुक्तवतः सज्जोपकरणस्य विमलेऽहनि साधके च कृतस्वस्त्ययनस्य विहिताऽऽदित्यविदेहाऽधिपतिप्रणामस्य पूर्वाह्णे निवातप्रकाशदेशस्थस्य प्रत्यादित्यमास्तरणेन लब्धमार्दवायां भूमौ प्रसारितचरणयुग्ममुपविष्टस्य क्षितितलगतसमतलोभयपाणेः पृष्ठतः सुखोपविष्टेन परिचारकेण हस्ताभ्यां निश्चलमवलम्बितशिरसः किञ्चिदुत्तानाऽऽस्यस्य स्वां नासामितरचेक्षणमीक्षमाणस्यातुरस्य नात्युच्छ्रितासननिविष्टो भिषक् दक्षिणहस्तानुलोममक्षिमुखबाष्पस्विन्नं निमीलितमीषदङ्गुष्ठोदरविमृदिततारकतया परिप्लुतदोषं सव्याङ्गुष्ठप्रदेशिनीभ्यामुन्मील्य दक्षिणमध्यमाप्रदेशिन्यङ्गुष्ठैर्निष्कम्पं गृहीतया शलाकया कृष्णभागाद्भागद्वयस्यापाङ्गादेकभागस्य च सङ्गमे दृष्टेरार्जवं नात्यूर्ध्वमधो वा नेत्रसहजन्मनि सन्धौ स्वाभाविके छिद्रे विध्येत् (इन्दु) दैवकृतच्छिद्रादन्यत्र व्यधात्सिरावेधाच्छोणितेनाक्षि पूर्यते (इ.सुउ.१७.७२) 'एवमेव हस्तकर्मवैपरीत्येनाऽऽतुरस्य दक्षिणं नेत्रं विध्येत्' (इन्दु.) सम्यक्व्यधलक्षणम्—अथ शब्दवदवेदनं साम्बुबिन्दुस्रुति च सम्यग्विद्धं विद्यात् । प्रविष्टमात्रां च शलाकां धारयेत् । रागाऽश्रुवेदनाऽनुत्पादनार्थं च स्तन्येन सेचयेत् । ततः पुनरातुरमाश्वास्य भ्रमयन् शलाकां दृष्टिमध्यं यावत्प्रवेशयेत् । अधश्चास्याऽवलोकयतो लिङ्गनाशमद्भुतमविलम्बितमनुसुखमधोमुखमपनयेदुच्छिंघयेच्चैनम् । तथा दृक् स्वस्तकफस्य विशुध्यति । विशुद्धदृष्टेश्चाङ्गुलिं तन्तून् ज्ञातीन्सन्ततीश्च दर्शयेत् । प्रेक्षमाणस्याऽमीलितान्नेत्राच्छनैः शनैः भ्रमयन्निव शलाकामपकर्षेत् । अथ व्यपगतदोषस्य यथावत्पश्यतः सुखोष्णघृताऽऽप्लुतं पिचुमीक्षणस्योपरि दत्वा बध्नीयात् । ततो निवातमागारमनुप्रवेश्य संवेश्य च सोपधाने मृदुशयने शयानं दक्षिणेऽक्षिणि विद्धे वामेन पार्श्वेन, वामे दक्षिणेनोभयस्मिन्नुत्तानमनुकूलाभिः कथाभिरुपाचरेत् । यथाशक्ति चैनमुपवासयेत् । उद्गारक्षवथुकासनिष्ठीवनोत्क्षेपणानि त्र्यहं परिहरेत् । स्नानाम्बुपानदन्तधावनाऽधोमुखाऽवस्थानानि सप्ताहम् नाचरेत् । स्नेहविधिं चेक्षेत । मूर्ध्नि पादयोश्च घृताभ्यङ्गमाचरेत् तृतीये चाह्नि मुक्त्वाक्षि परिषेचयेदेरण्डपल्लवशृतेन दुग्धेन कवोष्णेन दुग्धेन वा । जीवनीयैर्वा सिद्धेन पयसा हविषा वा । तद्वल्लघुना पञ्चमूलेन । ततः पूर्ववद्बध्नीयात् । ततःप्रभृत्येवमेव प्रत्यहमासप्ताहम् । सप्तमे तु दिवसे सर्वथा मोक्षयेत् दशमे वा । भोजयेच्चैनं व्योषामलकयुक्तं द्रवमीषत्स्नेहलवणं वाय्यमुष्णोदकद्वितीयं, विलेपीं वा । एवमाचरतो रुजारागादयो नानुवर्तन्ते (असंउ. १७)

लिङ्गनाशस्य स्वभावदोषाः— स्फुटनमवगलनं विस्तरणं लीनतोत्प्लवनं चेति । तत्रोपचाराः— स्फुटने एरण्डपत्रादिभिः स्वेदः शोधनं च कृष्णादिभिरवपीडनं । अवगलने स्तन्यसेकोऽवपीडनं जलौकसश्च । विस्तरणे सुखोष्णाम्बुवासः स्वेदो घृतमण्डश्च । उत्प्लवने वित्रासनं, शीताऽम्भसा प्रततं चोच्छिन्दनम् । लीनतायां क्षीरेण नाडीस्वेदः शताह्वादिघृतं प्रतिमर्शश्चेति (असंउ. १७)

अस्थानव्यधोपद्रवास्तत्र चिकित्सितं च— (सु. १७.७३-९९) अपाङ्गाऽऽसन्नविद्धे शोफशूला-

श्रुरक्तता भवन्ति । तत्र भ्रूमध्ये उपनाहमुष्णाज्यसेचनं च कुर्यात् ( सुउ. १७.७३ ) आसन्नकृष्णेन व्यधाद्रागः कृष्णं च पीड्यते तत्राधःशोधनं विरेको जलौकोभिः रक्तमोक्षणमाज्यसेकश्च कार्यः। उपरिविद्धे कष्टा रुक् सम्प्रवर्तते तत्रोष्णाज्यपरिषेकः प्रशस्तः। अधोवेधेन शूलाश्रुरागास्त्वल्पर्थं शलाकामनु च आस्रावः, तत्रं पूर्ववच्चिकित्सितम् शलाकयाऽतिविघट्टिते रागाश्रुवेदना स्तम्भो हर्षश्च जायते तत्राऽनुवासनं स्नेहस्वेदौ च हितौ। तरुणदोषे अप्राप्तलिङ्गनाशे व्यधान्नेत्रं शुक्लाऽरुणं भवति; तीव्रा रुक् नष्टदर्शनं च। तत्र मधुरसिद्धेन घृतेन नेत्रप्रसेकः कार्यः। शिरोबस्तिं दद्यात् च तेनैव घृतेन। मांसभोजनमपि दद्यात्

दुष्टशलाकाजनिता व्यापद्–कर्कशा शलाका शूलं कुरुते। खरा समन्ताद्दोषस्यागमनं कुरुते। स्थूलाग्रा विशालं व्रणं कुरुते। विषमा जलाऽऽस्रावं कुरुते। अस्थिरा क्रियासङ्गं करोति। दुष्टव्यधाऽऽहाराचारजा उपद्रवाः रागः शोफोऽर्बुदं चोषो बुद्बुदं शूकराक्षिताऽधिमन्थादयश्चान्ये रोगाः स्युः। यथास्वं तानुपाचरेत् (सुउ. १७.७३-८३; सुउ. १७.८५.८६ ) यदासामान्यापायेनोपद्रवा न शाम्यन्ति तदा औपनासिकाऽपाङ्ग्या ललाट्या सिराः व्यधेत् भ्रूर्ललाटशङ्खप्रदेशेषु दहेत्

( असंउ. ४०; सुउ. १७.९५

दृष्टिमंडल गत रोग. नीलिका, पटल, आंध्य अशी नावे आहेत. डोळ्यातील दृष्टिमंडळ म्हणजे बाहुली. या बाहुलीचा आकार मसूराचे डाळीएवढा असतो. पंचभूतांचे ते प्रसादरूप असे बनले आहे. उन्हात त्याचा अत्यंत संकोच होतो. सावलीत संपूर्ण विकास होतो व ते डोळे चोळले की इकडून तिकडे हालते. नेत्रपटलाचे ठिकाणी कफ दुष्टि म्हणजे लिंगनाश. **संप्राप्ति**—वाढलेला दोष दृष्टिमंडल झाकून टाकतो. लिंगनाश हा सात प्रकारचा आहे.

(१)वातज (२) पित्तज (३) कफज (४) सांनिपातिक (५) औपसर्गिक (६)द्विदोषज (७) रक्तज.

लिंगनाशाचे उपद्रव मंडलाच्या रंगावरून सहा आहेत.

(१) आवर्तकी (२) शर्करा (३) राजीमती (४) छिन्नांशुका (५) चन्द्रकी (६) छत्रकी.

यावरील चिकित्सा–शस्त्रकर्म.

साध्यासाध्यत्व–वात पित्त सम संसर्ग सन्निपात उपसर्गज असाध्य. कफज केवळ साध्य.

प्रकार–(१) वातज–बाहुली चंचल लालसर व खरखरीत (२) पित्ताने निळी, पिवळी व काशासारखी (३) कफाने जाड, स्निग्ध, शंख, कुंदाचे फूल, चंद्रासारखी पांढरी (४) त्रिदोषाने अनेक रंगाची (५) रक्ताने रक्ताळलेली, जाड काचेसारखी, लालसर, प्रवाळ, कमल, यासारखी (६) दोन दोषांनी, त्या दोन्ही दोषांच्या गुणांची. (७) आगंतुकारणाने–दुबळ्या मनाच्या मनुष्याने एकदम सूर्यासारख्या तेजस्वी पदार्थाकडे पाहिले तर वातादि दोष, पहाणारे दृष्टिरूप तेज सुकवून दृष्टीला वैडूर्य मण्याच्या रंगाची, स्थिर वेदनारहित नेहमी सारखी बाहुली करतात व दृष्टिनाश करतात. याला औपसर्गिक असेही म्हणतात. उपद्रव–(१) **आवर्तक**—पांढरी, तांबूस, अस्थिर व गोल गरगर फिरते. (२) **शर्करा**—रुईच्या दुधाचा थेंब किंवा फाटलेल्या दुधाच्या कणांनी भरलेली (३) **राजीमती**—साळीच्या कुसळासारख्या रेषांनी व्यापलेली (४) **छिन्नांशुका**—ठिकठिकाणी फाटलेल्या, वाकड्या तिकड्या जळालेल्या सारखी वेदनायुक्त (५) **चंद्रकी**—लोखंडासारखी, मोराच्या पिसाच्या टोकासारखी (६) **छत्रकी**— अनेक रंगांची किंचित उंचावलेली छत्रासारखी **साध्यासाध्यत्व**—वात, पित्त, रक्त, द्विदोषज त्रिदोषज व औपसर्गिक हे ६ प्रकार असाध्य व कफज सुद्धा उपद्रव रहित असेल तरच साध्य. **उपचार**—अर्ध-चंद्राकृति मोती, घामाचा थेंब कठिण खडबडीत, रेषायुक्त निरनिराळ्या रंगाचा वेदना युक्त, लाली युक्त, बिंदूवर असता शस्त्रक्रिया करू नये. शिरास्राव करण्यास अयोग्य. तहान–पडसे–खोकला अजीर्ण यानी पीडित, भित्रा, वांती झालेला, डोके, कान, डोळा, यांत शूल असेल तर, अतिउष्णता, थंडी वारा किंवा अभ्रे असता व अगदी दिसेनासे झाले नसेल तर शस्त्रक्रिया वर्ज्य.

**शस्त्रकर्माचा विधि**—ज्या अर्थी कफाने बाहुलीवर संचय व वाढ होऊन ती जाते त्या अर्थी कफविश्लेषणासाठी सळईच्या टोकाने दृष्टिमंडल खरडावे. सळई तांब्याची किंवा सोन्याची खरखरित इ० दोषरहित, आठ अंगुळे लांब, मध्ये

दोऱ्याने वेढलेली, आंगठ्याच्या पेऱ्या एवढी जाड असावी, ती दोन्ही तोंडाला कोन्हांटीच्या फुलाच्या कळीसारखी असावी.

**शस्त्रकर्माचे स्थान व रोग्याचे आसन**— काहीही अडचण, अडथळा नसणाऱ्या, धूळ धूर वारा–ऊन्ह इत्यादी नसलेल्या घरात उताणेच निजावे, व शस्त्रकर्म चालू असता सळई डोळ्यात असते तो पर्यंत रोग्याने ढेकर, शिंक, खाकरणे, खोकणे, हालणे करू नये. **मुख्य शस्त्रकर्म विधि**—योग्य रीतीने स्निग्ध करून, विरेचनाने निर्मल झालेल्या रोग्याला तुपाशी व्यवस्थित भोजन घालून रात्री मांसरसाने डोके शास्त्रोक्तविधीने तृप्त करून (डोक्याला मांसरसामर्दन करून) ढग नसलेल्या स्वच्छ अशा दुसऱ्या दिवशी सर्व साधने जवळ घेऊन अनशेपोटी शुभदिवशी स्वस्ति-वाचन करून, सूर्य, जनक राजा याना नमस्कार करून पहिल्या प्रहरी वारा व प्रकाश नसलेल्या जागेत मऊ अंथरुणावर पूर्वेकडे तोंड करून दोन्ही पाय पसरून दोन्ही हात एकाच पातळीत आथरु-णाला टेकवून, पाठीकडे तक्या देऊन, सुख वाटेल असे बसवून, परिचारकाने आपल्या दोन्ही हातांनी त्याचे डोके न हालेल असे किंचित तोंड वर करून धरावे, रोग्याला स्वतःच्या नाकाकडे व्यवस्थित पहाण्यास सांगून इकडेतिकडे पाहाणाऱ्या किंवा पाहू नये म्हणून रोग्याच्या जवळ थोड्या उंच आसनावर वैद्याने बसून उजव्या हाताकडे येणारा रोग्याचा डोळा आपल्या तोंडाच्या वाफेने शेकून, तो मिटवून, रोग्याला थोडा मिटण्यास सांगून आंतील बाहुली अंगठ्याच्या आतील भागाने हळूच चोळून आंतील दोष वर आल्यावर डाव्या हाताचा आंगठा व बोट यांनी डोळा उघडून, उजव्या हाताचा आंगठा व जवळच्या दोन्ही बोटांनी सळई घेऊन हात कापू न देता काळे बुबुळ सोडून डोळ्याच्या बाहेरच्या संधीकडील बाजूने एक तृतीयांश व बुबुळाकडून दोन तृतीयांश पांढरा भाग सोडून त्या संधीवर शिरा सोडून फारच वर किंवा फार खाली नव्हे अशा बेताने मध्यावर असलेल्या दैवकृत छिद्रात शलाका घालावी. अशीच रोग्याच्या उजव्या डोळ्यात वैद्याने आपल्या डाव्या हाताने सळई घालावी. **व्यवस्थित वेध झाल्याचे लक्षण**— एक आवाज होतो, वेदना होत नाही व एक पाण्याचा थेंब बाहेर येतो. **वेध चुकला तर**-शिरा कापल्या गेल्याने रक्ताने डोळा भरतो. **शस्त्रक्रिया पुढे चालू**- आत घातलेली सळई स्थिर ठेवून डोळ्यावर अंगावरचे दूध शिंपडावे म्हणजे लाली वेदना व आसु येत नाहीत. नंतर रोग्याला धीर देऊन मोतीबिंदूपर्यंत सळई फिरवून आत घालावी व फार घाई न करता वेळ न घालविता मोतीबिंदु कापून खाली ढकलावा हे करताना रोग्यास नाकाकडे खाली पाहाण्यास व उलट बाजूची नाकपुडी दाबून दुसरीने वर श्वास ओढण्यास सांगावे म्हणजे दृष्टिमार्गातील कफ गेल्याने ती शुद्ध होते. तेव्हां त्याला बोट, दोरा इ० दाखवावे. नंतर नातेवाईक व मुले दाखवावी. व याच अवधीत सळई डोळा न मिटता हळू हळू फिरवून बाहेर काढावी. व नंतर गाईच्या तुपात भिजवलेला कापसाचा बोळा डोळ्यावर ठेवून तो बांधावा. नंतर वारा नसलेल्या खोलीत उशी असलेल्या मऊ शय्येवर निजवावे, उजव्या डोळ्यावर शस्त्रक्रिया केल्यास डाव्या कुशीवर, डाव्या डोळ्यावर केल्यास उजव्या कुशीवर आणि दोन्ही डोळ्यावर केल्यास उताणे निजवून ठेवावे, मनोरंजक अशा कथा त्याला सांगाव्या व मन रिझवावे. त्याला शक्य तितका उपवास करावयास सांगावे. तीन दिवस ढेकर शिंक खोकला, थुंकणे, इत्यादि न येतील असे करावे. आणि स्नान, पाणी पिणे, दात घासणे, तोंड खाली करणे, हे सात दिवस वर्ज्य करावे. व स्नेहविधीप्रमाणे वागावे. डोके व पाय यांना तूप चोळावे. तिसऱ्या दिवशी पट्टा सोडून एरंडाच्या पानांनी सिद्ध केलेल्या दुधाने किंवा कोमट दुधाने डोळ्यावर सिंचन करावे. जीवनीय औषधाने किंवा लघुपंचमूळाने सिद्ध दुधाने किंवा तुपाने ही सिंचन करावे. व डोळा पहिल्यासारखा बांधावा. असे एक आठवडा चालवावे. नंतर सात किंवा दहाव्या दिवशी डोळा संपूर्णतया सोडावा. सुंठ, मिरी, पिंपळी, आवळा युक्त पातळ थोडे तूप व सैंधव घातलेला पेजेसारखा आहार द्यावा नंतर दुसऱ्या दिवशी भाजलेल्या जवाचे पीठ ऊन पाण्यात घालून, किंवा आटवल थोडे घट्ट करून द्यावे. असे केले असता वेदना लाली इत्यादी येत नाहीत.

**दृष्टिनाशाचे स्वाभाविक दोष—व उपचार**—(१) शलाकेने मोतीबिंदु फुटला तर एरंडपानें इत्यादीनी शेकावे व तुकडे काढावे व नेत्रशोधन करावे आणि पिंपळी, सैंधव, जेष्ठमध, यांचे अवपीडक नस्य द्यावे. (२) अवगलन म्हणजे स्राव हा दोष असेल तर स्त्रीच्या दुधाने डोळ्यावर सिंचन करावे. अवपीडक नस्य द्यावे व जळवा लावाव्या. (३) विस्तार असेल तर कोमट पाण्याची घडी ठेवावी शेकावे व कोमट तुपाच्या निवळीचीहि घडी ठेवावी. (४) उत्प्लवन म्हणजे उंचवटा दिसणे हा दोष जर असेल तर रोग्याला त्रास द्यावा आणि थंड पाण्याचे सारखे हबके मारावे. (५) लीनता म्हणजे खोल जाणे हा दोष असेल तर दुधाची वाफ पोकळ नळीने डोळ्यावर अति सौम्य स्वरूपात सोडून शेकावे. शतावरी इत्यादींनी सिद्ध केलेल्या घृताचा उपयोग करावा, आणि प्रतिमर्श्य नस्य द्यावे. **अस्थानी वेध केला असता होणारे उपद्रव व उपचार**— बाहेरच्या संधीजवळ वेध केला तर सूज, शूळ, आसवे व डोळा लाल होणे. हे होतात. भुवयीमध्ये हलुहलू शेकावे किंवा सौम्य पोटीस बांधावे. ऊन (कोमट) तूप शिंपडावे. काळ्या बुबुळाजवळ वेध केला तर लाली व त्यात बुबुळांत वेदना होतात. यावर रेचक, जळवा लावणे व तूप शिंपडणे उपयुक्त. वर छेद केला तर कष्टकारक वेदना होतात. त्यावर ऊन तूप शिंपडणे प्रशस्त. खाली वेध केला तर शूल, आसवे, लाली अतिशय येते. सळई बाहेर काढताच सारखा स्राव होतो. उपचार वरीलप्रमाणेच. सळई अति जोराने दाबली तर लाली, आसवे, वेदना, रोमांच व डोळा ताठणे ही होतात. त्यावर स्नेह आणि शेक हितकर. स्नेहबस्तीही उपयुक्त. दोष आमावस्थेत असून दिसण्याचे अजिबात बंद होण्याच्या अगोदर जर मोतिबिंदु काढला तर डोळा पांढरा व लाल होतो. अतिशय वेदना होतात व दृष्टि नाहीशी होते. यावर गोड औषधिगणातील द्रव्यानी सिद्ध केलेल्या तुपाने डोळ्यावर सिंचन करावे, त्याच तुपाचा शिरोबस्ति द्यावा. व आहारात मांस द्यावे. **सळई दोषयुक्त असली तर होणारे अनिष्ट परिणाम**— सळई कठीण असली तर शूल, खरखरीत असली तर सर्व दोष दुष्ट होतात, टोक जाड असले तर मोठा व्रण होतो. जाड बारीक अशी विषम असली तर पाण्याचा सारखा स्राव होतो. हात कापत असेल तर शस्त्रक्रिया करता येत नाही व वाईट शस्त्र क्रियेचे उपद्रव होतात. लाली, सूज, आवाळू, चोखल्यासरखी पीडा बुडबुड्यासारखा फोड आणि डुकरासारखे डोळे होतात. डोळे आल्यानंतर योग्य उपचार न केल्याने जे डोळ्याचे विकार होतात तेहि होतात. त्या त्या उपद्रवाप्रमाणे उपचार करावे. बरे न झाल्यास नाकाकडची, कानाकडची, कपाळावरची अशा शिरा तोडून रक्त काढावे. भुवई, कानशील व कपाळ या ठिकाणी डाग द्यावा.

**–पतन**–न., लक्षण० गुह्यरोगभेदः उपदंशः (असंउ. ३८; र. २५.२१) लिंगपतन, गुह्यरोगाचा भेद, उपदंश.

**–पाक**–पु., लक्षण० लिङ्गस्य पचनं कोथो वा (चचि. ३०.१६९) लिंग पिकणे, सडणे.

**–वर्ति**–स्त्री., रोग० लिङ्गार्शोरोगः (मानि.) लिंगार्शरोग.

**–विकार**–पु., रोग० मेढ्ररोगः (र. २९.१३८) शिस्नरोग.

**–वृद्धि**–स्त्री., मेढ्रस्य लिङ्गवर्धनोपायैः स्थूलीकरणम् (सुनि. १४.३) शिश्न मोठे होण्याच्या उपायाने शिश्न मोठे व जाड करणे.

**–व्याधि**–पु., रोग० मेढ्ररोगः (र. २५.१६) शिस्नरोग.

**–सम्भूता**–स्त्री., वनस्पति० लिङ्गिनी (रापरि. ३.१६) शिवलिंगी.

**लिङ्गार्शस्**–न., रोग० मेढ्ररोगः लक्षणम्–अङ्कुरैरिव सञ्जातैरुपर्युपरिसंस्थितैः क्रमेण ताम्रचूडशिखोपमा वर्तिः जायते। कोशस्याभ्यन्तरे सन्धौ सर्वसन्धिगता लिङ्गवर्तिः लिङ्गार्शं इत्यभिख्याता (मानि.) शिश्नाला मूळव्याधीप्रमाणे आजूबाजूला कोंब येणे. व ते कोंब वरवर येत जाऊन कोंबड्याच्या डोक्यावरील तुऱ्या सारखी रचना बनते. अंडकोशात, संधीत ही लिंगवर्ती होते. हिलाच लिंगार्श म्हणतात.

**लिङ्गिका**–स्त्री., वनस्पति० लिङ्गिनी (र. २०.३०-३५) शिवलिंगी.

**लिङ्गिन्**–वि., ब्रह्मचारी, तपस्वी (दूत०) (चइ. १२.१७) तपस्वी, ब्रह्मचारी.

**( लिङ्गिनी )**-स्त्री., **ब्रह्मचारिणी, तपस्विनी** ( सुचि. २४.१२२ ) तपस्विनी, ब्रह्मचारिणी.
**वनस्पति० गुणाः-कटुः उष्णा दुर्गन्धा रसायनी वृष्या सर्वसिद्धिकरी दिव्या रसनियामिनी सिध्म-हरा च** ( रापरि. ३.१८ )
हिं.—शिवलिङ्गी, ईश्वरलिङ्गी.
**म.—शिवलिङ्गी.**
गु.—शिवलिङ्गी.
शिवलिंगी. **गुण**—तिखट, उष्ण, दुर्गंधी सर्व धातुपरिपोष व वरच्या दर्जाचे धातु उत्पन्न करणारी, शुक्राला बल्य, दिव्य पाऱ्याचे नियंत्रण करणारी, शिबेनाशक दिव्य वनस्पती.

**लिद्दी**-स्त्री., **अश्वशकृत्** ( र. १०.९ ) घोड्याची लीद.

**लिप्तास्यता**-स्त्री., **कक्षण० लिप्तमुखत्वम्, लेपयुक्त-मिवास्यं यस्य सः तस्य भावः** ( सुउ. ३९.५० ) तोंड चिकट होणे, तोंडाला चिकटा उत्पन्न होणे.

**लिप्सु**-वि., **आस्वादयितुमिच्छुः** ( सुउ. ६०.१४ ) चव घेऊ इच्छिणारा.

**लिह्याख्या**-स्त्री., **रोग० कर्णपालिकाया पिटिकायुक्तो रोगः कफासृक्कृमिजाः सूक्ष्माः सकण्डूक्लेदवेदनाः पिटकाः तासामेव लिह्याख्येतिसंज्ञा । ता उपेक्षिताः पालिं लिहयुः शोषयेयुश्च** ( असंउ. २१ )
कर्णपाळीला होणारा एक रोग. कफ रक्त व कृमींनी खाज, स्राव वेदना असणाऱ्या सूक्ष्म पुळ्या होतात. उपचाराचे अभावी कानाची पाळी चाटून खातो किंवा सुकवितो.

**लीढ**-वि., **लेहनपद्धत्या गृहीतम्, यथाऽन्नमवलेहादि च** ( सुशा.४.१९ ) चाटून खाणे, अवलेह इ० चाटणे.

**लीन**-वि., **असम्यग्दर्शितम्** ( ड. सुउ. ६५.६ )
अयोग्य तऱ्हेने दाखविलेला.
**श्लिष्टम्, यथा स्रोतःसु लीन आमः** (अहसू. ८.२८) चिकटलेला. जसा आम स्रोतसांना चिकटलेला असतो तसा.
**लयं गतम्, सर्वावयवशः एकीभूतम् यथा रसः कवलितगगने** ( र. १.४२ ) **गूढः, यथा रसः पारदो भूतले खाते गूढः** ( र. १.८८ )
एकत्रीकरण झालेला. गूढ जसे पाऱ्याला अभ्रकाचा ग्रास दिला असता तो त्याच्याशी एकरूप होतो. किंवा जमिनीत खाणीतच लीन असतो.

**–गर्भ**-पु., गर्भरोग० ( असंशा. ४ )**यस्या गर्भिण्या वातोपसृष्टस्रोतसि संलीनो भवति गर्भः तं लीनमित्याहुः** ( असंशा. ४.३२ ) **सम्प्राप्तिः–स्रोतसामार्तववहादीनां वातोपद्रवगृहीतत्वाच्छोषा-दिभिरुपद्रुतत्वाल्लीयते श्लिष्यति नितरामनाप्यायि-तत्तेन लीनो भवति** ( सुशा. १०.५७ ) **लीनो गर्भः प्रसुप्तो न स्पन्दते** ( असंशा. ४ ) **चिकित्सा–तैलेनचाभीक्ष्णमुदरवंक्षणोरुकटिपार्श्वपृष्ठान्यभ्य-ञ्ज्यात् । मुहुर्मुहुश्चैनां हर्षयेत् । एवमवृद्धोऽस्पन्दनो वा तीक्ष्णैर्विरेच्यः अपरापातनीयैश्च पातयितव्यः** ( असंशा. ४ )
लीनगर्भ. वाढ न होणारा गर्भ. वातोपसृष्ट स्रोत-सांना चिकटलेला गर्भ. गर्भाची वाढ, स्पंदन, हालचाल काहीही होत नाही. आर्तववाही इत्यादी स्रोतसात वाताने शुष्क होऊन गर्भ लीन होतो. उपचार– तेलाने वारंवार अभ्यंग करून तो वाढीला लागण्याचा प्रयत्न करावा. उदर, जांघ मांड्या, कंबर, पाठ यांनी अभ्यंग करावा या प्रयत्नाने काहीही उपयोग होत नाही असे नक्की ठरले तर गर्भस्राव करावा. वार पाडणारी व तीक्ष्ण गर्भपाती औषधे देऊन पाडावा.

**–त्व**–न., **एकदेशस्थितत्वम्** ( सुउ. ३९.६५ ) एकाच ठिकाणी राहाणे.

**लीलाविलास**–पु., **पारदयोग० पारदगंधकताम्ररौप्या-दिसाधितोऽयं अम्लपित्त नाशकः** ( र. १८.२२०–२२३ )
सिद्धौषधाचे नाव. पारा, गंधक, ताम्र, रौप्यादिकांनी साधित. अम्लपित्तनाशक.

**लुङ्ग**–पु., न., **वनस्पति० मातुलुङ्गम्** ( र. २.८६; ध. ५.२३) महाळुंग.

**लुञ्चन**–न., **उत्पाटनम्, यथा केशादीनां लुञ्चनमुत्पाटनम्** ( असंचि. ९) उपटणे, केस इ० उपटणे.

**लुलाय**–पु., **पशु० महिषः** (र. १२.७४) रेडा.

**–कन्द**–पु., **वनस्पति० शुभ्रालुः** ( रापरि. ७.३३ ) पांढरा कंद.

**–लोचन**–पु., **निर्यास० धूपद्रव्यम्, गुग्गुलुभेदः महिषाक्षगुग्गुलुः** ( र. १२.१२१ ) द्र० ' **गुग्गुलु** ' म्हशागुग्गुळ.

**लुलित**–वि., **आन्दोलितम्** ( असंचि. ६ ) खिळखिळे झालेले. घुसळलेले.

**लूता**–स्त्री., **सविषकीट० स वृत्तः, अष्टांघ्रिश्च** ( सुक. ८.९०-९३ ) **तस्य पादषङ्कमिति केचित्** ( अह.कोष.) **कीटलक्षणं धारयन्त्यः लूताः कीटाश्च**

संज्ञिताः ( असंउ. ४४ ) नानारूप महाविषास्ताश्च षोडश ( सुक. ८.९०-९३ ) तेषां सम्भवाः—विश्वामित्राय क्रुद्धस्य वसिष्ठस्य ये ललाटजाः स्वेदलेशाः, ते निकटवर्तिनि लूने च्छिन्ने तृणे पतिताः, ते एव लूताः स्मृताः। खाण्डवदहने दह्यमानानाम् आसुराणां शरीराद्येऽग्निस्फुलिङ्गा विनिश्चेरुः, ते सम्प्रति लूता वर्तन्ते । भुक्तस्य दुष्टस्यान्नस्य मूर्च्छनान्मिश्रीभावात्कोद्रवविषवद्धे विषस्फोटा उत्पद्यन्ते, ते लूताः। विषस्फोट० ( असंउ. ४४, सुक. ८.९०-९३ ) भेदाः—विषप्रभावात्तीक्ष्णमध्यावरत्वेन त्रैविध्यं लूतायाः। तीक्ष्णाया लक्षणानि—लूतायास्तीक्ष्णविषं दाहपाकस्रावकरम्। ताः सप्तरात्रेण नरं निहन्युः (सुक. ८.८३) मध्यमलक्षणम्-यासां विषं मध्यमवीर्ययुक्तं ताः सप्तरात्रेणाधिकेनाऽपि नरं घ्नन्ति। मध्यमवीर्येण दशाहेन घ्नन्ति ( सुक. ८.८३; असंउ. ४४) अवरविषवीर्येण पक्षमात्रेण नरं विनाशयन्ति ( सुक. ८.८४ ) सर्वा लूताः श्वास—दंष्ट्रा—शकृत्—मूत्र—शुक्र—नख—लालाऽऽर्तवैर्विषमुद्वमन्ति (सुक. ३.५; असंउ. ४४) तेषां विषप्रसारः-लूतादूषितं वस्त्र-शयनाऽऽसनादिकं देहे संपृक्तं विकारकृत् ( असंउ. ४४ ) सामान्य-दंशलक्षणम्—दंशसमन्तात् पिडका विविधाकारा महान्ति मण्डलानि च महान्तो मृदवो रक्ताः श्यवाश्चलाः शोफा भवन्ति ( सुक. ८.९९-१०० ) दंशव्रणो दद्रुमण्डलसंनिभः। वर्णेन सितोऽसितोऽरुणः पीतः श्यावो वा स्पर्शेण मृदुरुन्नतश्च। दंशव्रण-मध्ये कृष्णश्यावर्णो वा दंशव्रणस्य परितो जालकाऽऽकाराभिः सूक्ष्माभिः सिराभिरावृतः विसर्प—शोफ—बहुवेदना—ज्वराऽऽशुपाक—विक्लेद—कोथावदरणान्वितश्च भवति। दंशव्रणोद्धूतेन पूयेन यदङ्गं स्पृशति, तत्र तस्मिन्नङ्गेऽपि व्रणं कुरुते, ( असंउ. ४४ ) तन्त्रान्तरोक्तम्—ज्वररोमहर्षरक्त-मण्डलादिकम् ( ड. सुक. ८.८०-८२ ) दूषीविषाभिर्लूताभिर्दष्टस्य लक्षणम्–' दंशस्य मध्ये यत्कृष्णं श्यावं वा जालकाकृतम्। दग्धाकृति भृशं पाकि क्लेदशोथज्वरान्वितम् ' ( चचि. २३.१४४-१४५ ) कालदृष्ट्या विषपरिणामो लक्षणानि च—लूतानां श्वासाद्यष्टविधविषोद्वमनसाधनसंपर्कादुद्भूतो दंशो व्रणो दिनार्धं पञ्चदशनाडिकामात्रं न दृश्यते। ततः प्रथमेऽहन्यसौ दंशोऽव्यक्तवर्णः प्रचलः किञ्चित्कण्डू-रुजान्वितः सूचीव्यधवत्पीडामावहति द्वितीयेऽहनि दंशः पर्यन्तभागेष्वत्युन्नतः पिटकाऽऽचितप्रतीतियुक्तश्च व्यक्तवर्णः स्पष्टपीतरक्ताद्यन्यतमवर्णो मध्ये निम्नः कण्डूयुक्तो ग्रन्थिसदृशश्च भवति। तृतीयेऽहनि रूपं दर्शयति। दंशो ज्वरान्वितो रोमहर्षकारी रक्त-वर्णमण्डलः शरावाकारोऽधिकव्यथो रोमकूपेषु रक्त-स्राववाँश्च भवति। चतुर्थेऽहनि विषं कोपमेति। दंशे प्रादेशिकदाहः श्वासभ्रमप्रदः शोफो भवति। पञ्चमेऽहनि दंशस्थितं विषं विषकोपजान् दाहकण्डूपर्वभेद-हृन्मोहादिकान्वक्ष्यमाणांस्तांस्तान् विकारान् कुरुते। षष्ठेऽहनि दंशस्थितं विषं सर्वमर्माणि व्याप्नोति। सप्तमेऽहनि अखिलमर्मस्थितं विषं जीवितं नाशयति (असंउ.४४) सर्वासां लूतानां विषमेकविंशतिदिनैः शाम्यति । दंशभेदाल्लक्षणानि—श्वासकृतदंशः सहसा शूयते ज्वरदाहवांश्च भवति। लालाकृतो दंशः अल्पमूलः अल्परुक्कोठः कण्डूरः मृदुश्च भवति । नखदंशः चोषपिडकाकण्डूधूमायनाऽन्वितो भवति। मूत्रकृतः दंशः, परितः रक्तवर्णः, मध्ये कृष्णवर्णः विशीर्यते। स तु आवर्तसदृशः शूनः पूतिः सर्पति दह्यते च दंष्ट्राकृतो दंशः उग्रतरः विवर्णः कठिनः स्थिरश्च भवति गम्भीरशोफवांश्च। आर्तवेन कृतो दोषः किंशुकोदरवर्णः विपक्वपीलुफलवत्पाण्डुवर्णो-भवति। पुरीषजे दंशः दुर्गन्धिदाहकण्डूचिमचिमा-न्वितश्च भवत्याशु च पच्यते। शुक्रकृतो दंशो ग्रन्थि-संस्थानः कठिनस्तीव्रवेदनश्च भवति (सुक.८.८८; असंउ. ४४ ) लूताविशेषनामानि लक्षणानि च— वायव्यलूता—कुमुदा—अलविषा रक्ता—चित्रा—सन्तानि;—मेचका—कसना; एताः सप्त वायव्याः। ते च उद्भिदाः वायुरोगदाश्च भवन्ति। तेषां सामान्यतो लक्षणानि—परुषता श्यावता पर्वभेदादि—रुक्। तत्र आलविषाख्यया लूतया आदंशे रक्तमण्डनिभे सर्षपा इव पिडका जायन्ते। तथा तालुशोषश्च दाहश्च भवतः ( सुक८. १०९-११० ) आग्नेयलूता नामानि—कपिला—अग्निमुखी—पीता—पद्मा—मूत्रा—सिता—असिता च। ताः पित्तविकारदाः स्वेदजाश्च भवन्ति । तासां लक्षणानि—दाहस्तृट् स्फोटो ज्वरश्च। सौम्यलूता नामानि—पाण्डुरा -रक्त-पादिका-भृङ्गा-पिङ्गा-त्रिमण्डला-पूतिः-वीरा चेति । श्लेष्मविकारदास्ता अण्डजा भवन्ति तासां लक्षणानि—कठिनो पाण्डुवर्णः शोफः कण्डूरल्परुजा

च । सङ्कीर्णलूता नामानि–ताश्च उपपादिका उच्यन्ते तन्नामानि– काकाण्डी - एणपदी– लाजा–वैदेही – जालिनी–माला–गुणा–सवर्णा चेति । ज्वलदग्निवदाशु गात्राणि व्याप्नुवन्त्यसाध्याश्च भवन्ति। तेषां लक्षणानि–हृन्मोहो हिध्मा श्वासः शिरोग्रहः पिटिका श्वेताऽसिता पीतरक्ता वा शोफोद्भवो वेपथुर्वमथुर्दाहस्तृडान्ध्यं वक्रनासता च । श्यावोष्ठत्वं वक्रदंतत्वं पृष्ठग्रीवावभञ्जनं पक्वजम्बूसवर्णं दंशाच्छोणितस्त्रावो भवति ( असंउ ९.४४ ) साध्याऽसाध्यता–कृच्छ्रसाध्या लूता अष्टौ–ताः त्रिमण्डला श्वेता कपिला पीतिका आलविषा मूत्रविषा रक्ता कसना चेति । विशेषेण ताभिर्दष्टे श्लेष्मवातिका गदा भवन्ति ( सुक. ८.९४-९६ ) अष्टौ असाध्याः–सौवर्णिका लाजवर्णा जालिनी एणीपदि कृष्णा अग्निवर्णा काकाण्डा माला, गुणाः– एताभिर्दष्टे त्रिदोषजा गदा भवन्ति (सुक.८.९७-९८)चिकित्सा-तात्कालिकं चिकित्सितम् लूताभिर्दष्टमात्रस्य देहिनः सम्यगादंशं वृद्धिपत्रेण उद्धरेत् ( सुक. ८-१२९ ) सामान्यतो दशविध उपक्रमः— यथा नस्याञ्जनाभ्यञ्जनपानधूमावपीडकवलग्रहा उभयतः प्रगाढं संशोधनं सिरामोक्षश्च ( सुक. ८.१३४ ) मेदिनी सारो रसो लूतां नाशयेत् ( र. २०.१२५–१२८ )

लूत. विषारी कीडा या विषारी किड्यांना आठ पाय असतात. सहा पाय असतात, असेही काहींचे मत आहे. त्या वाटोळ्या असतात. ह्या सूक्ष्म स्वरूपातील लूतांचे किड्याच्या शरिरात रूपांतर होते. तेव्हा त्याना कीट म्हणतात. विविधरूपाच्या व महा विषारी अशा ह्या १६ प्रकारच्या आहेत. या लूतांच्या विषांच्या प्रभावावरून त्यांचे तीक्ष्ण, मध्यम अवर असे तीन प्रकार कल्पिले आहेत. या सर्व विषारी लूतांच्या विषाचा परिणाम त्यांच्या श्वास, दाढा, विष्ठा, मूत्र, शुक्र, नखे, लाला, आर्तव यांच्या द्वारे होतो.

विश्वामित्रावर रागावलेल्या वसिष्ठाच्या कपाळाच्या घामाचे थेंब जवळ असलेल्या कापलेल्या गवतावर पडले. त्यापासून लूता उत्पन्न झाल्या. खांडववन जळाले तेव्हा त्यात जळणाऱ्या राक्षसांच्या शरीरातून अग्नीच्या ज्या ठिणग्या बाहेर पडल्या त्या आतां लूता होत. वाईट अन्न खाल्ल्यानंतर कोद्रूच्या विषासारखे जे विषस्फोट उत्पन्न होतात त्यांनाही लूता हे नाव आहे. प्रकार व लक्षणे (१) तीक्ष्ण लूतांचे विष–दाह, पाक, स्राव करणारे व सात दिवसात मारणारे. (२) मध्यम लूतांचे विष–सात दिवसां नंतर किंवा दहा दिवसां पर्यंत मारक होते. (३) अल्प विषारी लूतांचे विष पंधरा दिवसात मारक ठरते.

यांच्या विषाचा प्रसार वस्त्रे, अंथरुणे, पांघरुणे यांच्या द्वारे शरिराशी संपर्क येऊन होतो. सामान्य **दंश लक्षणे**–दंशाच्या भोवती निरनिराळ्या आकाराच्या पुळ्या, मोठी मंडळे मोठ्या मऊ, लाल, काळ्या, अस्थिर, सूजयुक्त अशा होतात.

दंशाचा व्रण गजकर्णाच्या चकंदळाप्रमाणे असतो व त्याचा रंग पिवळा, पांढरा, काळा, काळसर, तांबूस असतो. स्पर्शानें मऊ आणि उंचवट्याचा, असतो. व्रणाच्या मध्यभागी काळा सावळा रंग होतो. आणि व्रणाच्या भोवती जाळ्याच्या आकाराचे सूक्ष्म शिरांनी वेढलेले धावरे, सूज, वेदना फार, व्रण लौकर पिकतो; वाहतो; कुजतो, चरतो आणि त्याबरोबर ज्वरही असतो व रोमांचही असतात. त्याचा पू जेथे जेथे लागेल तेथे तेथे पुन्हा व्रण होतो. **कालदृष्टीने विषाची वाढ व लक्षणे**--लूतांच्या श्वासादि द्वारा जे विषसंपर्काचे प्रकार आहेत त्यांपैकी कोणत्याही प्रकाराने झालेला विषारी दंश **अर्धा दिवस प्रथम**—दिसत नाही. **पहिल्या दिवसानंतर**—किंचित् अस्पष्ट रंग, खाज, वेदना, सुई टोचल्या सारखी पीडा थांबून थांबून सुरू होते. **दुसऱ्या दिवशी**— दंशांच्या कडेला अति उंच पुळ्यांनी युक्त दिसणारा पिवळ्या किंवा तांबड्या मधल्या भागी खोल, खाजयुक्त, गांठी सारखा तो दंश भाग होतो.

**तिसऱ्या दिवशी**–तांबड्या वर्णाचे परळाच्या आकारासारखे अधिक वेदनांचे रोमांच आणि ज्वरयुक्त पुळ्यांनी युक्त असा होतो. त्वचेच्या रोमरंध्रांतून रक्तस्राव होतो, **चवथ्या दिवशी**—विष प्रकुपित होते. दंशाच्या जागी दाह व सूज येते. श्वास व भ्रम होतो. **पांचव्या दिवशी**—दाह, खाज, सांधे दुखणे, मूर्च्छा, इत्यादी विकार होतात. **सहाव्या दिवशी**—विष सर्व मर्मस्थाने व्यापते. **सातव्या**

**दिवशी**—मर्मस्थ विष मृत्यू आणते. सर्व लूतांचे विष एकवीस दिवसांनी शमते.

**दंश भेदाला अनुसरून लक्षणे—श्वासकृत विषसंसर्गात**—एकदम सूज येते, ताप व दाह होतो. **लाळेच्या विषसंसर्गात**—अल्प वेदना, मऊ खाजरी, खोल नसलेली पुळी होते. **नखाच्या दंशात**—चोखल्या सारखी पीडा, खाज, धूर निघतो आहे अशी वेदना युक्त पुळी होते. **मूत्रकृत** विषसंसर्गाने—भोवताली तांबडा मध्ये काळा असा रंग येऊन ती जखम चरते, भोवऱ्यासारखी सूज व पू युक्त पसरणारी घाण व आगयुक्त असते, पसरते व दाह होतो. **दातांनी केलेला दंश**—अधिक उग्र, अनेक वर्णांचा कठीण, स्थिर, खोल, आणि सूजयुक्त असतो. **रजाने विष संसर्ग झाल्यास**—पळसाच्या फुलासारखा, पिकलेल्या पीलूसारखा व पांढरट वर्णाचा होतो. **मळाचा विषारी संसर्ग**—दुर्गंधि, दाह, खाज व चिमचिम युक्त आणि लौकर पसरणारा व पिकणारा असतो. **शुक्राच्या विषसंसर्गाने**—तो भाग गाठीसारखा कठीण व तीव्र वेदनायुक्त असतो. लूताचे प्रकार— नावे वर मुळात आहेत. वायवीय लूता सात आहेत. त्या जमिनीत उत्पन्न होतात व वातजरोग निर्माण करतात.

**सामान्य लक्षणे**— काळसरपणा, रखरखीतपणा, व सांधे फुटणे इत्यादी वेदना. आलविषा नामक लूताच्या दंशस्थानी रक्तातून पृथक् झालेल्या द्रवाच्या रंगाच्या मोहरीसारख्या पुळ्या उत्पन्न होतात. टाळू सुकते व दाह होतो.

आग्नेय लूता—नावे मुळात वर आहेत. त्या घामापासून उत्पन्न होतात. पित्तविकारकारक असतात.

**लक्षणे**—दाह, तहान, फोड आणि ज्वर.

**सौम्य लूता**— नावे मुळात वर आहेत. त्या कफविकारकर आणि अंडज होत. लक्षणे— कठीण, खाजयुक्त, पांढरी, थोड्या वेदनांची सूज येते.

**संकीर्ण लूता**— नावे मुळात वर आहेत. दंश झाल्यावर विष अग्नीप्रमाणे लौकर अवयव व्यापते. मूर्च्छा, उचकी, श्वास होतात, असाध्य असतात. लक्षणे— पुळ्या पांढऱ्या, काळ्या, पिवळ्या, तांबड्या असतात. सूज असते. डोके जखडते, कंप, ओकारी, दाह, तहान, अंधत्व, आणि नाक वाकडे होणे, ओठ काळे, दात वाकडे, पाठ, मान मोडणे; व दंशातून पिकलेल्या जांभळाच्या रंगाप्रमाणे रक्तस्राव होतो. साध्यासाध्यत्व—आठ लूता कष्टाने साध्य. आठ असाध्य. त्यांची नावे वर मुळात आहेत. **तात्कालिक उपचार**—दंशाच्या भोवती, दंशासुद्धा चाकूने तो भाग कापून काढावा. नंतर नाकात औषध घालावे, अंजन घालावे, अभ्यंग करावे; धूम्रपान करवावे. अवपीडक स्नेह द्यावा. गुळण्या करवाव्या. द्रवद्रव्ये द्यावीत; जोराची ओकारी करवावी; रेचक द्यावे व शिरांतून रक्तस्राव करावा. मेदिनीसार. रस नांवाचे औषध द्यावे.

**–तन्तु**–पु., **लूतायाः सूत्राकारा लाला** ( अहृसू. ५.८ )
लूतांची दोऱ्यासारखी लाळ.

**–दंश**–पु., लूतायाः **दंशः** ( असंउ. ४४ )
लूतांचा दंश.

**–विष**–न., **लूताया विषम्** ( सुक. ८.७५ )
लूतांचे विष.

**लूतारि**–पु., **वनस्पति० दुग्धफेनी** ( रापरि. ५.३४ )
एक दुधाळ वनस्पती.

**लेखन**–वि., **लेखनकर्मकारी, पत्तलीकरणः**
(सुसू. ४६.५१९) **देहधातुमलान्वा विशोष्य यल्लेखयेत्तत्** (भाप्र. पू. ६.२२४) **यथा क्षौद्रम्। अनिलानलगुणभूयिष्ठम्** ( सुसू. ४१.६; असंसू. १७ ) **यथा रूप्यम्** ( असंसू. १२ ) **'यथा मार्द्वीकम्** ( अहृसू. ५.७२ ) **यथा मधु** ( सुसू. ४५.१३२ )
खरवडून काढणे, पातळ करणे, देह धातू अथवा मल यांना शोषण करून देह साफ करणे; ज्याप्रमाणे मध करतो. लेखनद्रव्य वात व अग्निगुणभूयिष्ठ असते. जसे रूपे, मनुकांचे आसव.

न., **औषधकर्म० पत्तलीकरणम्, वीर्यवशेन औषधकर्मनिष्पत्तिः** ( सुसू. ४०.५ )
वीर्याने शरीर कृश करणे.

**शस्त्रस्य कर्म० यथा दन्तलेखनशस्त्रेण दन्तानां लेखनम्** ( असंसू. ३४ ) **उपक्रम० शल्यतन्त्रे शस्त्रेण विलेखनम्** ( चसू. ११.५५ ) **शस्त्रादिघर्षणेन व्रणस्य तनूकरणम्** ( सुचि. १.८ )
पातळ करणे, खरडून काढणे, शस्त्राचे कर्म. जसे दंतलेखन शस्त्राने दात खरडून पातळ करणे.
शल्यशास्त्रात शस्त्राने खरडणे, शस्त्राने व्रण घासून पातळ करणे.

**रिक्तीकरणम्, यथा लेखनाञ्जनेन नयनस्य दोषस्रावणम्** ( सुउ. १८.५३-५४ )
मोकळे करणे, जसे लेखन करणाऱ्या अंजनाने डोळ्यातील दोषांचा स्राव करणे.

**( लेखनी )**–वि., **लेखनकर्मकरी ( यथा धाना )** ( असंसू. ७ ) लेखन करणारी ( लाही. )
स्त्री., **वनस्पति० काशः** ( रा. ८.२०१ )
कासगवत. दर्भाच्या जातीचे गवत.

**–बस्ति**–स्त्री., **बस्ति० स च त्रिफलाक्काथगोमूत्रक्षौद्रक्षारसमायुतः ऊषकादिप्रतीवापयुक्तः स्थौल्ये उपयुज्यते** (सुसू. १५.३२ ) **द्र० 'बस्ति'**
लेखनबस्ति. तो बस्ती त्रिफळेचा काढा गोमूत्र मध क्षार व मिरी इत्यादींची चटणी घातलेला स्थूलतेवर उपयुक्त.

**लेखनाञ्जन**–न., **नेत्ररोगोपयोगि लेखनद्रव्यसाधितं अञ्जनम्। तेन नेत्रस्य दोषस्रवणात् रिक्तीकरणं भवति** ( सुउ. १८.५३-५४ ) **अस्य गुणाः–नेत्रवर्त्मसिराकोशस्रोतःशृङ्गाटकाश्रितं दोषं मुखनासाक्षिभिः लेखनाञ्जनं स्रावयेत्** (सुउ. १८.५४) **लेखनाञ्जनं पञ्चविधम्–तद्यथा वातपित्तकफरक्तसंनिपातभेदेन। अञ्जने दोषभेदेन विशिष्टरसानामुपयोगः–तद्यथा वातेऽम्ललवणौ, पित्ते तिक्तकषायौ, श्लेष्मणि कटुतिक्तकषायाः रक्ते पित्तवत्, सन्निपाते रसद्वयं त्रयं वा** ( सुनि. १८.५३ ) **रोगभेदेन योजनाकालभेदः–स यथा पूर्वाह्णे श्लेष्मरोगे सायाह्ने वातरोगे रात्रौ पित्तजे योजना इति** ( सुउ. १८.५४ )
लेखन करणारे अंजन. याने दोषांचा स्राव झाल्याने डोळा रिकामा–हलका होतो. पापण्या शिरा स्रोतसे व शृंगाटक मर्माश्रित दोष तोंड नाक व डोळे यातून स्राव करून काढावेत. हे अंजन वातावर आंबट, व खारट, पित्तावर कडु व तुरट, कफावर तिखट कडु व तुरट आणि सन्निपातावर ५ प्रकारचे. दोन वा तीन रस रोगपरत्वे द्यावे. योजनेच्या वेळेची भिन्नता जसे–कफावर सकाळी, वातावर सायंकाळी, पित्तावर रात्री योजना करावी.

**लेखनात्मक**–वि., **लेखनकरम्, यथा विविधधान्यानि लेखनात्मकानि** ( असंसू. ७ )
दोष खरडून काढण्याचे कार्य करणारी धान्ये.

**–वर्ति**–स्त्री., लेखनाञ्जनार्थमुपयुक्ता वर्तिः (असंउ.१४)
लेखनाकरिता वापरली जाणारी वर्ति–वात–कांडी.

**लेखनीय**–वि., लेखने हितः ( चसू. ४.८ ) **लेखनीयानि द्रव्याणि मुस्त-कुष्ठ-हरिद्रा-दारुहरिद्रा-वचा-अतिविषा-कटुरोहिणी-चित्रक-हैमवती इति दश। इमानि लेखनीयानि** ( चसू. ४.९; असंसू. १५ )
लेखनाकरिता हितकारक दहा औषधांचा समुदाय–नागरमोथा, कोष्ठ, हळद, दारुहळद, वेखंड, अतिविष, कुटकी, चित्रक, पिवळा धोत्रा. हा १० औषधांचा गण. लेखनकार्यकारी आहे.

**लेखसाटक**–पु., **वनस्पति० श्लेष्मातकः** ( ध. ५.९४ )
भोकर.

**लेखा**–स्त्री., रेखा ( चइ. ११.९; असंशा. ११ )
रेखा, मर्यादा.

**–स्थवृत्त**–वि., **रेखा, मर्यादा, कर्तव्याऽकर्तव्यमर्यादा तत्र स्थितं वृत्तं यस्य सः** ( चशा. ४.३७ ( ४ )
योग्य अयोग्य समजण्याच्या मर्यादा. कर्तव्य अकर्तव्य यांच्या मर्यादांप्रमाणे वागणारा.

**लेखार्ह**–पु., **वनस्पति० श्रीतालः** ( रा. ९.९५ )
एकप्रकारचा ताड.

**लेखिन्**–वि., **लेखनद्रव्यसंयुक्तः अथवा, लेखनकर्मकारी.**
लेखनाची द्रव्ये संग्रही असणारा, लेखनाचे काम करणारा तो लेखी.
पु., **निरूहप्रकार० लेखी शोधनद्रव्ययुक्तत्वात्** ( सुचि. ३५.१९ )
लेखनद्रव्यसंयुक्त–शोधक असा लेखनकारक बस्ति.

**लेख्य**–न., **शस्त्रकर्मभेदः अष्टविधशस्त्रकर्मस्वेकम् लेखनीयम्** ( सुसू. ५.५ )
आठ प्रकारच्या शस्त्रकर्मांपैकी एक. दोष तासून, खरडून काढणे.
वि., **लेखनकर्मयोग्यम्, यथा किलासम्** ( चचि. २५.५९ )
**लेख्यविषयाः–चतस्रो रोहिण्यः किलासमुपजिह्विका मेदजो दन्तवैदर्भो ग्रन्थिर्वर्त्म अधिजिह्विकाऽर्शो मण्डलकुष्ठं मांसकन्दी मांसोन्नतिरिति लेख्या रोगाः** ( सुसू. २५.९-१० )
दोष खरडून काढण्यायोग्य विकार. कोड, चार रोहिणी रोग, जिभेच्या खालची सूज, मेदज दंताचा दंतवैदर्भ विकार, पापणीला होणारी गाठ, पडजीभ, मूळव्याध, त्वचेवरचे मंडल नांवाचे कोड, मांसांकुर, मांसाची वाढ.

**-पत्र**-पु., वनस्पति० तालः ( ध. ५.६८ ) ताड.

**-रोगप्रतिषेध**-पु., अध्याय० ( सुउ. १३.१ ) या नावाचा अध्याय. शरिरातील दोषांचे लेखन करावयाच्या रोगांचे उपचार यात आहेत.

**लेख्याञ्जन**-न., नेत्राञ्जन० **कुक्कुटाण्डकपाललशुनकटुकत्रयकरञ्जबीजैलासिद्धमिदं नेत्ररोगे उपयुज्यते** ( सुउ. १२.२५-२६ ) अंजनाचे नाव. कोंबड्यांच्या अंड्याची टरफले, लसूण, सुंठ, मिरी, पिंपळी, करंजबी आणि वेलची द्रव्ययुक्त तयार केलेले अंजन नेत्ररोगात उपयोगी.

**लेप**-वि., लिहन् ( असंउ. ४९ ) चाटत चाटत.

पु., उपक्रम० **आलेपनम्** ( अहसू. ६.१८; सुसू. १८.७.८ ) **स त्रिविधः, प्रलेपः प्रदेह आलेपश्च । प्रलेपः शीतस्तनुरविशोषी विशोषी च । प्रदेहस्तु उष्णः शीतो वा बहलोऽबहुरविशोषी च । मध्यमोऽत्र आलेपः । तत्र रक्तपित्तप्रसादकृदालेपः, प्रदेहो वातश्लेष्मप्रशमनः सन्धानः शोधनो रोपणः शोफवेदनापहश्च । अविदग्धेषु शोफेष्वालेपनं हितं भवेत् । रसरक्तमांसप्रसादनानामग्र्यं दाहकण्डूरुजापहम्** ( सुसू. १८.७-८ ) **आलेपो दशविधः स्नैहिकः निर्वापणः, प्रसादनः, स्तम्भनो, विलायनः पाचनः, पीडनः, शोधनो, रोपणः, सवर्णकरश्च,** ( असंउ. ३० ) लेपविधिः– **नातिशीतो नात्युष्णो नातितनुर्नातिबहलः स्यात् । शोफानां सामान्यः प्रधानतमश्चोपक्रमः तनुलेपान्नोष्माणमन्तःप्रवेशयति सुखाय च भवति** ( सुचि. १७.७ ) **लेपस्य प्रमाणम्–महिषार्द्रचर्मोत्सेधः** ( सुसू. १८.११ ) **घनतनुलेपत्वात्कर्म० शीतस्पर्शोऽपि चन्दनः घनलेपेन दाहकृद्भवति । उष्णस्पर्शवतोऽगुरोस्तनुलेपः शीतकृत् भवति** ( असंसू. ७ ) **लेपार्थं सामान्यतः शिम्बीधान्यानामुपयोगो भवति** ( अहसू. ६.१८ ) द्र० 'प्रदेह'

लेप; प्रकार तीन. (१) प्रलेप (२) प्रदेह (३) आलेप. (१) **प्रलेप**—म्हणजे गंधासारखा पातळ पदार्थाचा थंडगार दुखऱ्या भागावर लेप करणे, तो कदाचित वाळेल अगर वाळणार नाही.

( २ ) प्रदेह म्हणजे थंडगार किंवा गरम गरम असा जाडसर थोडा पण न वाळणारा लेप. प्रदेह वातकफशामक, संधान करणारा, शोधन, रोपण करणारा, सूज आणि वेदनानाशक, विदग्ध न झालेल्या सुजेवर उपयोगी. रस रक्त मांस यांच्या विकृती दूर करणारा, दाह खाज रुजा नाशक. आलेप म्हणजे मध्यमसर लेप. हा रक्तपित्ताचे प्रसादन करतो. त्याचे दहा प्रकार आहेत. ( १ ) स्नैहिक ( २ ) निर्वापण ( ३ ) प्रसादन ( ४ ) स्तंभन ( ५ ) विलायन ( ६ ) पाचन ( ७ ) पीडन ( ८ ) शोधन ( ९ ) रोपण ( १० ) सवर्णकर. **लेपविधि**—अति थंड वा उष्ण, अति पातळ किंवा जाड, नसावा. सर्वप्रकारच्या सुजेवर हा प्रधान उपचार होय. लेप अगदीच पातळ झाल्यास त्यातील उष्णता तो आत पोचवीत नाही व बरेही वाटत नाही. **लेपाचे प्रमाण**—म्हशीचे ओले चामडे जितके जाड असते तितका जाड लेप घालावा. अति घट्ट वा पातळ लेप घातल्यास–थंडस्पर्शाच्या चंदनाचाही घट्ट लेप दाह करतो, तर उष्णस्पर्शी अगरूचा पातळ लेप दाह शांत करतो. लेपासाठी सामान्यतः शिंबीधान्याचा (शेंगेत होणाऱ्या डाळींचा ) उपयोग होतो.

धातुकर्म० **उपलेपनम् । मांसधातोः श्रेष्ठं कर्म** ( असंसू. १; अहसू. ११.४ ) उपलेप, लपेटणे. मांस धातूचे श्रेष्ठ कार्य.

**प्रलेपनम्, इन्द्रियस्रोतसां प्रलेपः** ( चसू. २३.७ ) इंद्रियांची स्रोतसे लिप्त असणे. स्रोतसे यांना लेपलपेटा.

**-ज्वर**-पु., रोग० **स्वल्पशीतयुक्तः कफज्वरः** ( चक्र. चइ. ८.२४; असंशा. ११ ) थोडी थंडी वाजून येणारा कफज्वर, ज्वराचे प्रमाण फार कमी असते.

**-वेध**-पु., **लोहस्य लेपेन स्वर्णतां रौप्यतां वा प्रापणम् । वर्णोत्कर्षार्थं वाराहपुटं देयम्, 'लेपेन कुरुते लोहं स्वर्णं वा रजतं तथा । लेपवेधः स विज्ञेयः'** ( र. ८.९० ) लेपवेध, निरनिराळ्या औषधिद्रव्यांनी सिद्ध केलेले लेप. धातूच्या पत्र्यांना त्यांचा लेप देऊन वाराहपुट द्यावे. म्हणजे त्या धातूचे रुपे किंवा सोने होते. या क्रियेला लेपवेध म्हणतात.

**लेपन**-पु., **निर्यास० तुरुष्कः, धूपार्थमुपयुक्तः** ( रा. १२.३७ ) ऊद, धूप.

न., **उपनाहनम्, वातादिहरक्रिया** ( सुउ. २६.६ ) पोटीस लावणे. वातादिहारक.

**लेलिह**–पु., क्रिमि० **पुरीषजः** ( चसू. १९.४ ( ९ ); चवि. ७.१३; असंनि. १४ ) द्र० **'कृमि'**
विष्ठेतील विशिष्ट कृमी.

**लेलीत**–पु., खनिज० **गन्धकभेदः, वटसौगन्धिकः गन्धपाषाणो वा,** द्र० **'गन्धक'** ( ध. ३.११४ )
गंधकाचा प्रकार.

**लेलीतक**–पु., खनिज० **पाषाणभेदः औत्तरापथिकः** ( चक्र. चचि. ७.७० ) पाषाणभेद ( दगडी ).

**–वसा**–स्त्री., **सौवर्चललवणतैलम्, गन्धक इत्येके** ( अरु० अहृचि. १९.२४ ) **उत्तरापथे रसरूपा प्रसिद्धा, कुष्ठघ्नी** ( असंचि. २१ )
पादेलोण व तेल; गंधक. उत्तर प्रदेशात पातळ स्वरूपात असलेली प्रसिद्ध आहे. कुष्ठनाशक.

**लेलीन**–पु., खनिजद्रव्य० **गन्धपाषाणः** ( ध. ३.११४ )
गंधकपाषाण, गंधक.
खनिज० **गन्धकः** ( ध. ३.१०९ ) गंधक.

**लेह**–पु., **अवलेहः, प्राशः, मधुसर्पिरनन्तचूर्णं च** ( सुशा. १०.१३ )
अवलेह, प्राश, चाटण. जसे–मध तूप व धमासा चूर्णाचे एकत्र चाटण.
कल्प० **घनक्रिया** ( र. ८.२ ) **शर्करादीनां पाकात् कृतः, लिह्यते इति लेहः** ( चक्र. चसू. १३.२४ ) **यथा कुटजाऽवलेहः वासाऽवलेहः** ( ड. सुचि. ६.२१ ) **यथा भार्गवप्रोक्तश्च्यवनप्राशः** ( चचि. २८.२४२ ) **लेहस्य सम्यक्सिद्धिं तन्तुमत्त्वेन तथा अप्सु मज्जनेन च जानीयात्** ( असंक. ८ )
साखरेचा उपयोग करून चाटण्यासारखे केलेले द्रव्य. पाक. दोन तार येणे किंवा पाण्यात टाकताच गोळी बनून ती बुडणे ही पाक तयार झाल्याची लक्षणे. कुटजावलेह, वासावलेह अथवा भार्गव-मुनींनी सांगितलेला च्यवनप्राश हे सर्व लेहाचे कल्प आहेत.

**लेहन**–न., कल्प० **अवलेहः** ( कासू. लेहनाध्याय )
अवलेह, चाटण.

**लेहिन्**–पु., रोग० **कर्णपालिरोग० परिलेही** ( र. २४.१ )
कानाच्या पाळीचा रोग.

**लैङ्गी**–स्त्री., वनस्पति० **लिङ्गिनी** ( रापरि. ३.१६ )
लिंगिनी, शिवलिंगी.

**लोक**–पु., **जगत्** ( चशा. ४.१३ ) **सृष्टिः, 'लोको हि द्विविधः स्थावरो जङ्गमश्च'** ( सुसू. १.२२ )
सृष्टि, पृथ्वी, जगत्. दोन प्रकारची सृष्टी, स्थावर आणि जंगम.
**जङ्गमो भूतग्रामः** ( चसू. १.४६ ) जंगम, प्राणीमात्र.
**मानवः, जनः** ( चवि. ८.१४ ) मानव, मनुष्य, जन.
**समुदायः** ( चशा. ५.३ ) समुदाय, समूह.

**–कान्ता**–स्त्री., वनस्पति० **ऋद्धिः** ( रा. ५.१८७ )
ऋद्धि. अष्टवर्गापैकी एक. मुरुडशेंग.

**–दोषदर्शिन्**–वि., **लोकस्य दुःखाक्रान्तत्वरूपं दोषं पश्यति ततश्च विरक्तो भवति यः, सः** ( चशा. ५.१२ )
दुःखित लोकांचे दुःख पाहून, समजून विरक्त होणारा मनुष्य.

**–नाथ**–पु., **राजा** ( र. ८.४६ ) राजा.
पारदयोग० **रसतुत्थनागगंधकटंकणादिसाधितोऽयं राजयक्ष्महरः** ( र. १४.५३-५५ )
या नावाचे औषध. पारा, मोरचूद इत्यादीयुक्त.
पारदयोग० **पारदगंधकवराटकटंकणादिसाधितोऽयं वातातिसारनाशनः** ( र. १६.३२-३५ )
या नावाचे औषध. पारा. गंधक, कवडी, टाकणखार इ० युक्त औषध. वातज अतिसार नाशक.

**–नाथगुटिका**–स्त्री., पारदयोग० **पारदलवणपंचक-सहिंग्वादिसाधिता इयं सन्निपातहरा** ( र. १२.७४-७५ )
या नावाचे सिद्धौषध. पारा, पांच मिठे, हिंग इ० युक्त. संनिपातहर.

**–पाल**–पु., देवता० **जनपालकः एते हि 'दर्शनात् स्पर्शनात्कीर्तनाच्चाऽशुभानि व्यपोह्याऽर्थसिद्धिं दिशन्त्युत्तमाम्'** ( असंशा. १२ )
देवता. लोकांचा पालक. दर्शनाने, स्पर्शाने, भजनाने पापे नाहीशी करून उत्तम इच्छित फल देणारी.

**–मातामही**–स्त्री., **रेवतीग्रहस्य नाम** ( का बालग्रहचि. )
रेवतीग्रहाचे नाव.

**–संज्ञिका**–स्त्री., वनस्पति० **गुडूची** ( रा. ३.४ ) गुळवेल.

**–सम्मित**–वि., **लोकतुल्यः** ( चशा. ४.१३ )
सृष्टिधर्मसदृश.
**लोकप्रमाणः** ( चशा. ५.३ ) सृष्टिधर्मसदृश.

**लोकाक्ष**–पु., ऋषि० **रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः** ( चसू. १.१२ )
लोकाक्ष नावाचा ऋषि. रोगनाशक उपायांचा विचारविनिमय करणारे एक महर्षि.

**लोकावयव**–पु., **लोकस्यावयवः, यथा तरुतृणपश्वादिः** ( चशा. ५.४ )

जीवसृष्टीचे निरनिराळे विभाग. झाडे, गवत, पशु इत्यादी.

**लोकेश**–पु., खनिज० पारदः ( रा. १३.४१ ) पारा.

**लोकेश्वर**–पु., पारदयोग० **पारदसुवर्णगंधकचित्रकादिभिः साधितोऽयम् अग्निमान्द्यकार्श्यकासहिक्काहरः** ( र. १४.३३-४८ )
या नावाचे सिद्धौषध. पारा, सुवर्ण, गंधक इत्यादीयुक्त. अग्निमांद्य, कृशता, खोकला, उचकी नाशक.
पारदयोग० **गंधकशंखपारदचित्रकादिसाधितोऽयं ग्रहण्यादिहरः** ( र. १६.२७-३१ )
या नावाचे सिद्धौषध. पारा, गंधक, चित्रक इत्यादीसाधित. ग्रहणीहारक.

**लोचन**–न., शारीर० **नेत्रम्** ( सुउ. १.१४; असंसू. ३ ) डोळा.
वनस्पति० **नेत्रवाला इति प्रसिद्धम्, वालकम्** ( र. ११.३७-३९ ) वाळा.

( **लोचनी** )–स्त्री., वनस्पति० **महाश्रावणिका ( मुण्डी )** ( रा. ५.२१९ )
गोरखमुण्डी.

–**हिता**–स्त्री., वनस्पति० **कुलत्थिका** ( ध. ३.१५६ ) रानकुळीथ.
**कुलत्था** ( रापरि. ५.१८ ) रानकुळीथ.

**लोचमर्कट**–पु., वनस्पति० **अजमोदा** ( ध. २.९८ )
अजमोदा, ओवा.

**लोट्टाक**–पु., **शाकभेदः, फञ्जीचिल्ल्यादिगणे, लोट्टामारिषः** ( चसू. २७.१०० )
तांदुळजाचा एक प्रकार.

**लोठन**–न., **इतस्ततो नयनम् यथा शिरोलोठनम्** ( चचि. ३.१०६ )
अवयव इकडून तिकडे हालविणे, जसे डोके हलवीत रहाणे.

**लोडा**–स्त्री., वनस्पति० **क्षुद्राम्लिका** ( रा. ५.४३ )
चुका, घोळ, आंबोती.

**लोढर**–पु., रोग० **हलीमकः** (असंनि. १३) द्र० **'पाण्डु'**
पांडुरोग अवस्था.

**लोण**–न., **लवणरसमृत्तिका, लवणम्, सैन्धवम्** ( र. १०.८४ )
लवण, मीठ, लोणारमीठ. सैंधव.

(**लोणा**)–स्त्री., वनस्पति० **क्षुद्राम्लिका** ( ध. ५.३६ )
चुका, घोळ, आंबोती.

–**तृण**–न., वनस्पति० **लवणतृणम्** ( रापरि. ८.५७ )
कांडे आंबट लागणारे, खारट गवत.

–**त्रय**–न., **लवणत्रयम्, सैन्धवं विड्लवणं सौवर्चलं चेति** ( र. १५.२६-२८ )
तीन मिठे. सैंधव, बिडलोण व पादेलोण.

**लोणाम्लिका**–स्त्री., वनस्पति० **क्षुद्राम्लिका** (रा. ५.४३)
चुका, घोळ, आंबोली.

**लोणारक्षार**–न., लवण० तद्गुणाः–**लवणं क्षारयुक्तमत्युष्णं तीक्ष्णं वातघ्नं पित्तकरं गुल्महरं च** ( रा. ६. १३ )
लोणार सरोवरातील मीठ. खारट, क्षारयुक्त अति उष्ण, तीक्ष्ण, वातघ्न, गुल्महारक, पित्तकारक.

**लोणिका**–स्त्री., वनस्पति० **क्षुद्राम्लिका** ( ध. ५ ३६ )
लोणी, घोळ, आंबोली.
शाक० **फञ्जीचिल्ल्यादिगणे** ( चसू. २७.१०२ )
फंजी चिल्ली इत्यादी गणातील एक.
शाक० **घोली** ( चचि. ९.३३ ) **लोणिया** गुणाः–**स्वादुपाकरसा लवणाऽनुरसा सक्षारा शीता रूक्षा कफघ्नी नाऽतिपित्तला वातला सरा** ( सुसू. ४६.२७४-२७५ )
हिं.—खुर्सा.
**म.—भुईघोळी, घोळ.**
बं.—छोटा लुनीया.
गु.—लोनी.
ता.—पारुकिरे.
फा.—कुरफा.
घोळ. गुण— रस व पाक गोड. थोडी खारट, ( मागाहून ) क्षारयुक्त, थंड, रूक्ष, कफनाशक, थोडी पित्तकर, वातुळ व सारक.

**लोणीका**–शाक० **घोली** ( चचि. १४.१२३ ) **लोणारः** ( अहसू. ६.९३-९६; असंसू. ७ )
घोळ.
**क्षुद्राम्लिका, ( चाङ्गेरी )** ( भा. प्र.; असंचि. १० )
आंबोली, चुका.

**लोध्र**–पु., न., वनस्पति० **वृक्षोऽयं हेमन्ते पुष्पितो भवति** ( सुसू. ६.२३-२४ ) **कुष्ठहरप्रदेहे उपयुक्तः** ( चसू. ३.५; चसू. ३.१२ ) **त्वग्दोषस्वेदहरप्रघर्षणद्रव्ये** (चसू. ३.२९) **दौर्गन्ध्यहरप्रदेहे** (चसू. ३.२९) **निर्वापणप्रदेहे** ( चसू. ३.२६ ) **वर्त्मरोगे लेपार्थमुपयुक्तः** ( असंउ. १२ ) **पुरीषसंग्रहणीयगणे** ( चसू. ४.१५; असंसू. १५ ) **सन्धानीयगणे** ( चसू. ४.९; अहसू. १५.३८; असंसू. १५ ) **शोणितस्थापनगणे** ( चसू. ४.१८; असंसू. ३६ )

**अवचूर्णनार्थं दद्रुरोगे** ( चसू. ३.१० ) **सिराव्रणमुखे** ( अहृसू. २७.४८ ) **धूमपानप्रयोगे** (चसू.५.२२) **श्यामादिशाकवर्गे** (असंसू.७) **गुणाः– कषायः शीतो रूक्षो ग्राही–रोपणः** ( असंसू. १६) **–वयःस्थापनः** ( असंसू. १५ ) **कफहरस्तृष्णाऽरोचकविषहरः, पक्वातिसारहरः** (असंसू. १६)**–रक्तपित्तप्रशमनः** (सुउ. ४५.२५) **लघुः कफपित्तनुत्, चक्षुष्यः, रक्तातिसार–शोथप्रदरघ्नः**
( भाप्र.; ध. ३.१७५; शानि. )
हिं.—लोध, पठानी लोध.
**म.—लोध, लोध्र.**
गु.—लोधर, पठानी लोधर.
बं—लोधकाष्ठ, पाटियालोध, लोध्र.
ता.—वेल्लीलोथी.
रोध्र. हेमंतात फुलतो. मळ बांधणारा, हाडे सांधणारा, रक्त थांबविणारा, तारुण्य राखणारा, या गणातील एक. काळे तेड इत्यादी भाजीपैकी एक. कुष्ठनाश, घाम व त्वचादोष, दुर्गंधी, गजकर्णनाशक लेपात, उटण्यात, चूर्णात, उपयुक्त. संचित–साकळलेले पित्त रक्त कमी व्हावे म्हणून शिरेच्या व्रणाच्या तोंडावर घालण्यास, धूम्रपानाकरिता उपयुक्त. गुण– तुरट, थंड, रूक्ष, हलका, मळ घट्ट करणारा, व्रणरोपक, कफहारक, तहान, अरुचि, विष, पक्व अतिसार, रक्तातिसार, सूज, प्रदरनाशक.
**तिल्वकपर्यायः, लोध्रभेदः** ( चक. ९.३ )
रोध्राचा प्रकार.
**क्रमुकः, लोध्रभेदः, श्वेतलोध्रः** ( रा. ६.२४१ ) **वल्कलोध्रः, गुणाः–कषायः शीतश्चक्षुष्यो. विषहृत् वातकफहरो रक्तविकारघ्नः** ( ध. ३.१७७ )
पांढरा लोध्र. **गुण**—तुरट, थंड, डोळ्याला हितकर. विषहर, वातकफहारक, रक्तविकारनाशक.

**–पुष्प**–पु., वनस्पति० **मधुवृक्षः** ( **मधुक** ) ( ध. ५.४५ ) ज्येष्ठमध.

**–पुष्पिणी**–स्त्री., वनस्पति० **धातकी** ( रा. ६.१५२ ) धायटी.

**लोध्रक**–पु., वनस्पति० **लोध्रः** ( रा. ६.२३८ ) लोध, लोध्र.

**लोध्रादि ( गण )**–पु., द्रव्यगण० **लोध्र–सावरलोध्र–पलाश–कुटन्नट–अशोक–फञ्जी–कट्फल–एलवालुक–शल्लकी–कदम्ब–साल–कदली इति 'मेदःकफहरो गणः। योनिदोषहरः स्तम्भी वर्ण्यो विषविनाशनः'** (सुसू. ३८.१४-१५; असंसू. १६)
गण. लाल रोध्र, पांढरा रोध्र, पळस, टेंटू, अशोक, भारंगी, कायफळ, एक सुगंधी खरबूज, साग, काळी सावरी, कळंब, राळ, केळ.

**लोध्रासव**–पु., आसुत० **लोध्रशटीपुष्करमूलमूर्वादिसाधितोऽयं कफपित्तप्रमेहादिहरः** (चचि. ६.४४) **चुञ्चुप्रभृतिशाकभोजनोत्तरम् अनुपानार्थम्**
( सुसू. ४६.४३३ )
लोध्रासव. रोध्र, कचोरा, पुष्करमूळ, इत्यादींनी साधित आसव. कफपित्तमेहहर.

**लोपाक**–पु., प्राणि० **मृगवर्गीयः, शृगालभेदः लाङ्गटकः, लाङ्गलकः, लोमशः इति पर्यायाः** (चसू. २७.३६; सुचि. ८.३७; सुचि. २५.२५; अहृसू. ६.४९; सुसू. ४६.७८; असंचि. १० )
हिं.—लोमडी.
**म.—कोल्हा.**
**अस्य मांसं यक्ष्मिणे उपयुक्तम्** (चचि. ८.१५२) **अस्य मांसरसः प्रवाहिकायामुपयुक्तः**
( चचि. १९.३८ )
एका जातीचा कोल्हा; आणखी तीन नावे वर आहेत. गुण–याचे मांस क्षय व मांसाचा रस आवरक्तावर उपयुक्त.

**लोभ**–पु., **मनोविकार० लौल्यम्** ( चनि. १.१५; चनि. ७.४ ) **लोलुपत्वम्** ( अहृसू. ४.२४ ) **परस्वग्रहणाऽभिलाषा** ( सुसू. १.२५ ( ३ )
लोलुपता. वस्तूबद्दल मनाला लागलेली ओढ, लालचीपणा, हसासणे, दुसऱ्याचे मिळावे ही इच्छा.
**लक्षण० अलब्धेष्वभ्यवहार्येषु लोलता, वासना**
( चनि. ७.७ ( १ )
न मिळणारे खाद्य मिळावे अशी वासना. त्याची मनाला लागलेली ओढ.

**लोभनी**–स्त्री., वनस्पति० **महाश्रावणिका ( मुण्डी, मुण्डिका )** ( रा. ५.२२० )
मुंडी, गोरखमुंडी.

**लोभनीया**–स्त्री., वनस्पति० **श्रावणी**, मुंडीचा प्रकार. **मुण्डी, मुण्डिका** ( ध. १.१६० ) मुण्डी.

**लोमन्**–न., शारीर० ( चसू. १.६९ ) **अस्थ्नो मलः** ( चचि. १५.१९ ) **बाह्यत्वग्वर्तिकेशः 'तनूरुहं रोम लोम।'** ( अमर; सुशा. ३.३३ ) **तत्संख्या– एकोनत्रिंशत्सहस्राणि नव च शतानि षट्पञ्चाशत्कानि केशश्मश्रुलोमानि** (२९ (९५६) चशा. ७.१४)
लव केश. अस्थींचा मळ. श्मश्रु व लव मिळून एकोणतीस हजार नउशे छप्पन्न असतात.

**(लोम)-करणी**-स्त्री., वनस्पति० **मांसरोहिणी** ( रा. १२.१३९ )
गर पुष्कळ असलेल्या वाटोळ्या लाल लवयुक्त फळाची वनस्पती.

**-कूप**-पु., **त्वग्रन्ध्रम्, स्वेदवाहनं मूलम्** (चवि.५.८)
त्वचेचे च्छिद्र, भोक, घाम आणणाऱ्या स्रोतसाचे तोंड.

**-कूपायन**-न., **लोमकूपस्त्वग्रन्ध्रम्, स एव मार्गः** ( चशा. ६.२३ )
केसांच्या मुळाशी असलेले त्वचेचे भोक.

**-दोष**-पु., **लोमविकारः, अस्थिप्रदोषजरोगेष्वेकः** ( चसू. २८.१६ )
केसांचा विकार. हाडांच्या दुष्टीने होणाऱ्या रोगांपैकी एक.

**-द्वीप**-पु., कृमि० **शोणितजस्ताम्रवर्णः, तत्संस्थानम्-अणुर्वृत्तोऽपादः, सूक्ष्मत्वाच्च भवत्यदृश्य इत्येके** ( चवि. ७.११; चसू. १९.४ (९); असंनि. १४ )
द्र० ' कृमि ' एक रक्तज कृमि. अणु इतका वाटोळा, पाय नसलेला तांबडा असा. सूक्ष्म म्हणून दिसत नाही असे एक मत.

**पिञ्जर**-वि., **रोमभिः पिञ्जरं कपिलवर्णम्, रोमराजिभिराचितमित्यर्थः** ( चचि. ७.१५ )
लवेने पिंगट रंगाचा. लवेने व्यापलेला.

**-राजि**-स्त्री., **रोमराजिः** ( कासू. २८ )
लवांची-केसांची रांग.

**-राजी**-स्त्री.,**रोमराजी, सेयम् उभयतो मध्यभागमागतानातिघना प्रशस्यते वैधव्यायातिस्थूला। अतिस्थूलघनलोमा पौंश्चल्याय। अधोजाता दौर्भाग्याय। नाभिमतिवृत्ता मध्यत्वाय** ( कासू. २८ )
केसांची रांग. दोन्ही बाजूंनी मध्यभागी आलेली पण थोडी दाट असलेली प्रशस्त. अति जाड वैधव्यसूचक. जाड केसांची व रांग ही जाड व्यभिचारवृत्तीची दर्शक. खाली जाणारी दुर्भाग्य दर्शक व बेंबीजवळ भोवताली असणारी मध्यम.

**-राज्युद्गम**-पु., लक्षण० **अधउदरे रोम्णां राजिवद् उद्गमः** ( चशा. ४.१६ )
उदराच्या खालच्या भागात केसांची रांग होणे.

**-रोहण**-न., व्रणोपक्रम० **लोम्नां रोहणम्, रोमसंजननोपक्रमः** ( चचि. २५.४३ )
एक उपचार. व्रणावर तो बरा झाल्यावर, पूर्वीसारखे केस येण्याचा उपचार.

**-विध्वंस**-पु., **रक्तजकृमि०** ( असंनि. १४ )
द्र० 'कृमि' एक रक्तामध्ये होणारा कृमि.

**-शातन**-न., **रोमशातनम् लोमापहरणम्** ( सुचि. १.१०५ ) केस कापणे, काढणे.

**-हर्ष**-पु., लक्षण० **पुलकाञ्चितत्वम्, रोमहर्षः, रोमाञ्चः** ( चचि. २८.२१ )
रोमांच उभे रहाणे.

**लोमशा**-पु., खनिज० **धातुकासीसम्** ( चसू. ३.४ )
हिराकस.
न., वनस्पति० **उपगतरोमफलम्, लोमशफला, शशाण्डुली** ( चक. २.६ )
धुरकट, वाटोळ्या लवयुक्त, थोडी आंबट, पुष्कळ फळाची वनस्पती.

**( लोमशा )**-स्त्री., वनस्पति० **काकजङ्घा** ( ध. ४.२३ )
लघुकावळी.
**वचा** ( ध. २.६ ) वेखंड.
**शणपुष्पी** ( रा. ४.२९८ ) सण.
**गन्धमांसी** ( ध.३.४७ ) जटामांसीचा एक प्रकार.
**उर्वारुकम्** ( ध. १.१७६ )
काकडीचा एक प्रकार.

**-कण्टा**-स्त्री., वनस्पति० **कर्कटी** ( रा. ७.२५२ )
काकडी.

**-कर्ण**-पु., प्राणि० **बिलेशयः, नलत्करः** ( सुसू. ४६.७८ )
कानावर पुष्कळ केस असलेला बिळातला प्राणी ( खोकड ).

**-पत्रिका**-स्त्री., वनस्पति० **देवदाली** ( रा. ३.२४४ )
देवडांगरी.

**-पुष्पक**-पु., वनस्पति० **शिरीषम्** ( रा. ९.१८९ )
शिरस.

**-फला**-स्त्री., वनस्पति० **शशाण्डुली** ( रापरि. ७.१०३ )
पहा 'लोमश'.

**लोमाद**-पु., कृमि० **लोमानि अत्ति इति** (चसू. १९.४-९) **शोणितजः ताम्रवर्णः अणुः वृत्तः अपादः सूक्ष्मत्वाददृश्यः** ( चवि. ७.११ ) द्र० 'कृमि'
केस खाणारे कृमि; रक्तज. तांबडे, अणु एवढे वाटोळे पाय नसलेले सूक्ष्म व न दिसणारे.

**लोमापनयन**-न., व्रणोपक्रम० **लोम्नां केशानां लेखनम् लोमापहरणम्** ( सुचि. १.८ )
व्रणाचा उपचार. केस काढणे,

**लोमापहरण**–न., उपक्रम० लोमशातनम् (सुचि. १.८) 'रोमाकीर्णो व्रणो यस्तु न सम्यगुपरोहति। क्षुरकर्तरिसंदंशैस्तस्य रोमाणि निर्हरेत् ।' (सुचि. १.१०४)
केस काढणे. कातरणे. केस असलेला व्रण नीट भरून येत नाही म्हणून वस्तरा, कातरी, चिमटा यांनी ते काढावे.

**लोलन**–न., लक्षण० लोठनम् ( असंनि. २ )
इकडून तिकडे अवयव हालणे.

**लोला**–स्त्री., वनस्पति० क्षुद्राम्लिका ( ध. ५.३६ )
अंबोती, अंबोली, चुका, लोणी, घोळ.

**लोष्ट**–न., मृत्पिण्डः ( असंसू. ३; अहसू. १७.६ )
मातीचा गोळा.

**–भेदिन्**–वि., मृत्पिण्डस्फोटनशीलः ( गर्हितदूतः ) ( सुसू. २९.११ )
मातीची ढेकळे फोडण्याची खोड असलेला. हे अशुभ दूताचे लक्षण.

**लोह**–पु., खनिज० ( चसू. १.७० ) अत्र लुहधातुः कर्षार्थवाची । रोगाकर्षकत्वाद् धातूनां लोह इति संज्ञोचिता ( र. ५.४ ) लोहः स्वर्णादिः (असंसू. ८) लोहः पञ्चविधो भवति रजतताम्रत्रपुसीसलोहात्मकः (चसू.१.७०) लौहानि षट्त्रपुसीसताम्ररूप्यसुवर्णकृष्णलौहानि ( सुचि. १३.५-६ )
सुवर्णं रौप्यं ताम्रमायसं वङ्गं सीसकं चेत्येतानि षट् ( र. १०.६७-६८ ) तेषां भेदाः–शुद्धलोहम्–कनकरजतं भानुलोहाश्मसारम् । पूतिलोहम्–नागवङ्गाभिधानम् । मिश्रलोहम्–पित्तलं कांस्यवर्तम् ( र. ५.१-३; १.९-१० ) कृत्रिमं लोहम्–कांस्यं पित्तलं च ( र. १०.६७-६८ )
लुह आकर्षणे या धातूपासून बनलेला शब्द. शारीर रोगांना ओढून काढतो. म्हणून धातूला लोह म्हणतात. प्रकार ५. रुपे, तांबे, कथील, शिसे व लोखंड किंवा प्रकार ६. वरील पाच व सोने. त्यांचे भेद (१) शुद्ध (२) पूति व (३) मिश्र. (१) शुद्ध–सोने, रुपे, तांबे, लोखंड ( २ ) पूति–शिसे, कथिल. ( ३ ) मिश्र पित्तल व कांसे यांना कृत्रिम लोहही म्हणतात.
न., खनिज० ( ध. ६.२६ ) आयसम् ( र. ५.७३ ) कृष्णवर्णधातुः, हीनधातुः ( सुसू. २९.७१-७२; सुसू. ४६.३२८ ) प्रकारः–मुण्डं तीक्ष्णं कान्तम् च ( र. ५.७३; सुसू. ४६.३२८ ) लोहदोषाः–' गुरुता दृढता क्लेदो कश्मली दाहकारकः, अश्मदोषः सुदुर्गन्धः ।' इति अयःस्थिताः सप्त दोषाः ( टीका ५.१०९ )
अशुद्धलोहसेवने परिणामाः–अशुद्धलोहसेवनादायुर्बलं कान्तिश्च विनश्यति हृदि पीडाकरमालस्यकरं शरीरे रुजाकरं च भवति तस्माद्विशोध्य मारयेत् ( र. ५.७९ ) लोहपत्रम्–प्रथमं शोधनात्पूर्वं पत्राणि कारयेत् । चतुरङ्गुलविस्तारमायामैश्च चतुरङ्गुलं तिलोत्सेधं तनु च लोहपत्रं प्रचक्षते ( टीका. र. ५.१०९ ) लोहग्रहणस्यान्या रीतिः–शस्त्रकृल्लोहकाराणां गृहे शोणोद्भ्रान्तं लोहचूर्णं चम्बुकाश्मना सङ्ग्राहयेत् ( टीका. र. ५.१०९ ) लोहशोधनम्–शशकरक्तप्रलिप्तं सत्रिवारं तापितं लोहं शुध्यति (र. ५.१०९) त्रिफलाक्वाथेन सामुद्रलवणं संपिष्य ततस्तेन लौहपत्रं प्रलेपयेत् । अनन्तरं तल्लोहपत्रं निर्वापणीयमेवं सप्तवारं कार्यम् । अनेन लोहं शुद्धं भवति ( र. ५.११२ ) चूडामणिमते विशुद्धलक्षणम्–न विस्फुलिङ्गा न च बुद्बुदश्च यदा न लेखा पटलं न शब्दः । मूषागतं रत्न समं स्थितं च तदा विशुद्धं प्रवदन्ति ( टीका. र. ५.१०९ ) लोहमारणं-भस्मीकरणम् समभागगन्धमिश्रं लोहचूर्णं कुमारीरसेन संमर्द्य संपुटीकृत्य पचेत् । एवं कियत्कालपर्यन्तं पुनः पुनः पुटीकृतं लोहमवश्यं म्रियते (र. ५.१३२) लोहस्य पत्राणां मारणार्थं चूर्णीकरणम्–लोहस्य पत्राणि तीव्रवह्नौ ध्मात्वा सद्यो जले क्षिपेत् केषांचिन्मते तस्य क्षेपणं गोमूत्रे क्रियते । अनन्तरं तेषां पाषाणोलूखलोदरे लोहपारया गाढनिर्घातैः चूर्णं कार्यम् । एवं यदि चूर्णं न स्यात्तर्हि तल्लौहं शरावसंपुटे रुध्द्वा तीव्राग्निना ध्मात्वा जले क्षिप्त्वा पूर्ववच्चूर्णयेत् ( र. ५.१८-२१ ) निरुत्थपरीक्षा–'सर्वमेतन्मृतं लौहं पक्तव्यं मित्रपञ्चकैः। यद्येव स्यान्निरुत्थं तत्. (टीका र. ५.१५-१६) मृतं लोहं वारितरं भवेत् ( र. ५.११६ ) भस्ममात्राऽनुपानं च–त्रिकटुवेल्लाज्यमधुसहितं शाणपरिमाणं सेवेत ( र. ५.१४८ )
भस्मगुणाः–कषायं तिक्तमुष्णरूक्षं तीक्ष्णम् (ध.६.२६) कृमि–पाण्डु–वात–क्षीणत्व–पित्तरोग–स्थौल्याऽर्शो– ग्रहणी– ज्वर– शोफ–प्रमेह–गुल्म–प्लीह–विष-कुष्ठाऽग्निमान्द्यहरम् । कफहरं बलकरं रसायनं च। मृतानि लोहानि रसीभवन्ति, युक्तानि

महामयान् निघ्नन्ति अभ्यासयोगाद्दृढदेहसिद्धिं कुर्वन्ति जरारुग्विनाशनं च(र.५.१४६-१४७)लोहस्य द्रवीकरणम् वनस्पतिभस्मावापेनैकविंशतिवारगोमूत्र-भावितस्य देवदालीभस्मनो वापेन मूषास्थं तीक्ष्णं लौहं सलिलसदृशं द्रुतं भवति। अस्मिन् प्रथमं मूषागतं लौहं वह्नियोगाद्ध्मनीयं, ततो वापो देयः, (र. ५.१५१) **गन्धकेन द्रवीकरणम्**-प्रथमतो गन्धकः सप्तदिनपर्यन्तं देवदाल्या रसेन भाव्यः, ततोऽस्य भावितगन्धकस्य प्रवापमात्रेण लोहा द्रवीभावमापद्यन्ते (र. ५.१५४)

लोखंड. काळ्या रंगाचा धातु. हीन धातु. प्रकार तीन–मुंड, तीक्ष्ण आणि कांत. लोहाचे दोष ७, जडपणा, कठीणपणा, ओलसरपणा, मळ (गंज) उत्पन्न करणारा, दाहकारक, मातीचे दोष आणि अति दुर्गंधयुक्त.

**अशुद्ध लोह सेवनाचे दुष्परिणाम**—आयुष्य, बल, कांती, नाहीशी होते. हृदयात व इतरत्र शरिरात वेदना होतात. आळस उत्पन्न होते. म्हणून ते शुद्ध करून भस्म करावे.

**लोहाचे पत्रे**—चार अंगुळे लांब रुंद आणि तिळाइतके पातळ लोहाचे पत्रे घ्यावेत. किंवा लोहाराच्या घरी असलेले लोहचुंबकाने ओढून घेतलेले लोहाचे चूर्ण उपयोगात आणावे.

**शुद्धि**–सशाचे रक्त माखून तीन वेळां तापवलेले लोह शुद्ध होते. त्रिफळाच्या काढ्यात मीठ कालवून लोखंडाच्या पत्र्यांना तो चोपडून नंतर ते तापवून पुन्हा त्या काढ्यामध्ये सात वेळा विझवावे.

**शुद्ध लक्षण**– जे लोह तापविले असतांना त्याच्यातून ठिणग्या निघत नाहीत, बुडबुडे येत नाहीत, रेषा दिसत नाहीत, पापुद्रे सुटत नाहीत, शब्द होत नाहीत, आणि मुसेमध्ये घालून तापविले असतांना जे रत्नाप्रमाणे चमकते ते लोखंड शुद्ध होय.

**भस्म**–लोखंडाच्या समभाग गंधक घालून कोरफडीच्या रसात घोटून परळामध्ये ठेवून पुटामध्ये भाजावे. पुन्हा पुन्हा अनेक पुटे दिल्याने भस्म होते. **लोखंडाच्या पत्र्यांचे चूर्ण करण्याची रीति**–पत्रे तीव्र निखाऱ्यावर फुंकून ताबडतोब पाण्यात टाकावे. गोमूत्रात टाकले तरी चालेल. नंतर लोखंडी खलामध्ये पहारीने ठोकून चूर्ण करावे. किंवा पत्रे परळामध्ये लालभडक तापवून पुनः पुनः पाण्यात टाकून पूर्वीप्रमाणे चूर्ण करावे.

**पूर्ण भस्म झाल्याची परीक्षा**–भस्मामध्ये मध, तूप, गूळ, गुंजा आणि टाकणखार, ही पाच द्रव्ये घालून मुशीमध्ये फुंकल्यावर जर त्याच्यात पुन्हा लोखंडाचे कण निर्माण झाले नाहीत तर ते खरे भस्म होय. पाण्यावर हे भस्म तरते.

**भस्माची मात्रा व अनुपान**–सुंठ, मिरी, पिंपळी, वावडिंग, तूप. मध याबरोबर तीन मासे या प्रमाणाने सेवन करावे. (ही पूर्वीची मात्रा आहे.)

**गुण**–तुरट, कडू, उष्ण, रूक्ष, तीक्ष्ण, कृमि, पांडु, वात, पित्त, क्षीणत्व, स्थूलता, मूळव्याध, ग्रहणी, ज्वर, सूज, प्रमेह, गुल्म, प्लीहा, विष, कुष्ठ, अग्निमांद्यहारक. कफहर, बलकर, आणि रसादी धातूंचे पोषण आणि दर्जा उत्तम करणारे.

**लोहभस्म**—पारद भस्मासारखे कार्य करते. व पाऱ्याबरोबर दिले असता मोठे रोग नाहीसे करते. सतत सेवन केले तर वेदना व म्हातारपण नाहीसे करून शरीर बळकट व सामर्थ्य संपन्न करते.

**लोह पातळ करणे**— (१) देवडांगरीच्या भस्माला एकवीस वेळा गोमूत्राच्या भावना देऊन ते भस्म मुसेमधील तीक्ष्ण लोहाच्या रसामध्ये ते टाकले असता ते तसेच पातळ राहाते. (२) देवडांगरीच्या रसाने गंधकाला सात दिवस भावना दिल्यानंतर वरील प्रमाणे त्याचा उपयोग केला तर लोह पातळ राहाते.

**खनिज० मुण्डलोहम्**, (रा. १३-२९) लोखंडाचा एक प्रकार.

**वर्तलोहम्** (ध. ६.३३) लोखंडाचा एक प्रकार.

**कृत्रिमधातु० कांस्यम्** (ध. ६.२३) कासे.

न., **निर्यास० अगरु** (ध. ३.२५) अगरू. एक डिंक.

**अगरुभेदः, काष्ठागरु**, द्र० 'अगरु' (रा. १२.४२) अगराचा एक प्रकार.

**–कर**–पु., **सुवर्णकरः लोहात्संस्कारैः सुवर्णीकरणं लोहकरत्वम्** (र. १.७०) संस्कारांनी लोखंडापासून सोने करणे, करणारा.

**–काठिन्यनाशनवर्ग**–पु., लोहस्य काठिन्यनाशकद्रव्याणां वर्गः समूहः, '**माहिषमेढ्राण्डगर्भः कालिङ्गो धवबीजयुक्। शशास्थीनि चेति** (र. १०.९७) धातूंची कठिणता नाशक वर्ग. म्हशीचा गर्भ रेड्याचे अंड व शिश्न इंद्रजव धावड्याचे बी व सशाचे हाड,

**–कान्तिक**–न., खनिज० कान्तलोहम् (रा. १३.२७)
कांतलोह.

**–कारिन्**–वि., लोहं नाम वपुर्दृढत्वं करोति इति लोहकारी शरीरदार्ढ्यावहः ( र. २.५९ )
लोखंडासारखे बळकट शरीर करणारे.

**–किट्ट**–न., खनिज० लोहमलम् ( सुउ. ४४.३२ ) लोहोच्छिष्टम् ( मण्डूरः ) ( रा. १३.३६ )
मण्डूर. .

**–खड्ग**–न., खनिज० तीक्ष्णलोहम् शस्त्रायसम् द्र० 'लोह' ( रा. १३.३० )
पोलाद. शस्त्र करण्यास उपयुक्त असे लोखंड.

**–खण्ड**–न., लोहमयं दर्व्यादिकम् ( र. २२.११३ )
लोखंडाची पळी, उलथणे इत्यादी.

**–गन्ध**–पु., लक्षण० रक्तगन्धः ( सुउ. ४७.६८ )
लोखंडासारखा वास, रक्तासारखा वास.

**–गन्धि**–वि., लोहम् अयः तद्गन्धवद् गन्धोऽस्येति ( चचि. १५.५४ )
ध्मायमानलोहस्येव गन्धः अस्य (सुसू. २८.९-१०)
लोखंडाच्या वासाचा.
मुशीत लोखंड फुंकत असताना येणाऱ्या वासाचा.

**–गन्धित्व**–न., लक्षण० रक्तगन्धित्वम्, लोहगन्धिभावः, रक्तगन्धिभावः, भिन्नकोष्ठे ( सुचि. २.१५ ) रक्तपित्तपूर्वरूपे ( चनि. २.६ ) ग्रहणीरोगे लोहगन्धोद्गारित्वम् ( सुउ. ४०.१७४)
रक्तासारखा किंवा तापलेल्या लोखंडासारखा वास तोंडाला श्वासोच्छ्वासाला येणे, कोठा फुटला असता होणारे लक्षण, रक्तपित्तरोगाच्या पूर्वचिन्हात होणारे चिन्ह; ग्रहणीरोगात ढेकरही अशाच वासाचे येतात.

**–चाटु**–पु., पात्र० लोहमयी दर्वी ( र. ५.१८१ )
लोखंडाची पळी.

**–चूर्ण**–न., खनिज० मण्डूरम् ( रा. १३.२६ ) मंडूर.
खनिजधातुचूर्णम्, अवसादनगणे उपयुक्तम् ( सुउ. १२.२४-२५ )
खाणीतील धातूंचे चूर्ण. फाजील वाढलेल्या व्रणाचा भाग कमी करण्यास उपयोगी.

**–ज**–न., खनिज० वर्तलोहम् ( रा. १३.३४ )
लोहाचा प्रकार.
मण्डूरम् ( रा. १३.३६ ) मंडूर.

**–द्राविन्**–पु., खनिज० टङ्कणक्षारः ( रा. ६.२८ )
टाकणखार,

**–नाडी**–स्त्री., लोहनलिका, लोहपात्रम् ( सुउ. ११.१२ )
लोखंडाची नळी, लोखंडी भांडे.

**–निर्यास**–न., खनिज० मण्डूरम् ( ध. ६.३५ )
मंडूर.

**–पारा**–स्त्री., लोहमयसम्मर्दनोपकरणविशेषः लोहवर्षकः ( र. २.४७-४८ )
पहार, लोखंडी बत्ता.

**–पुरीष**–न., खनिज० लोहमलम्, मण्डूरम् ( ड. सुचि. १८.५२ )
मंडूर. लोखंडाचा मळ.
वनस्पति० अगरु ( ड. सुचि. १८.५२ ) अगरू.
पारावतविट् ( ड. सुचि. १८.५२ )
पारव्याची विष्ठा.

**–पृष्ठ**–पु., पक्षि० प्रतुदवर्गीयः ( चसू. २७.५१ ) हिमालये जातः पक्षि० गुणाः–अस्य मांसं पाके रसतः कषायं शीतं गुरु बृंहणं वृष्यं च ( काखि. ३४.३५; असंसू. ७ )
टोचून भक्ष्य खाणारा हिमालयातील पक्षी. त्याचे मांस–तुरट, थंड, जड, पौष्टिक, शुक्रवर्धक.

**–मल**–पु., खनिज० मण्डूरम् ( सुसू. ३८.६२; र. २६.५०; रा. १३.३६ )
मंडूर.

**–मारण**–न., कर्म० आयसमारणम् ( र. २८.१४ )
द्र० 'लोह' लोखंडाचे मारण–भस्म करणे.

**–रसायन**–न., योग० कान्ताभ्रकरसायनपर्यायभूतम्, इदं रसायनं दीर्घायुष्करं नानाविधानुपानेन नानारोगेषूपयुक्तम् ( र. २८.५४-८६ )
कांतलोह, अभ्रकयुक्त औषध. हे सर्व धातूंची उत्कृष्ट दर्जाची वाढ करून, दीर्घायुष्य करते व अनेक अनुपानांनी अनेक रोगांवर उपयुक्त होते.

**–वाल**–पु., धान्य० शालिः ( चसू. २७.९)
साळ, भात.

**–वालाख्य**–पु., धान्य० शालिः ( अहसू. ६.३ )
साळ, भात.

**–शुद्धिकर**–न., खनिज० श्वेतटङ्कणम् ( टङ्कणक्षार ) (रा. ६.३१) पांढरा टाकणखार, (धातु शुद्ध करणारा.)

**–सङ्कर**–न., खनिज० वर्तलोहम् ( रा. १३.३४ )
मिश्रधातु, पंचरस धातु.

**लोहक**–पु., कृत्रिमधातु० पित्तलम् ( ध. ६.१८ )
पितळ,

**लोहलत्व**–न., अव्यक्तवाक्त्वम् ( र. १५.८१-८४ )
अव्यक्त वाक्य बोलणे, स्पष्ट न कळणारे बोलणे.

**लोहारिष्ट**–पु., आसुत० लोहपत्रशालसारमधुमाक्षिकपिप्पलादिगणादिसिद्धोऽयं अग्नेः प्रसादकः, कार्श्यकरः शोफनुत्, गुल्महृत्, कुष्ठमेहपाण्डुरोगहरः प्लीहोदरहरो विषमज्वरनाशनोऽभिष्यन्दाऽपहरणश्च (सुचि. १२.१२-१९)
साळईचा डिंक, किंवा नार, मध, सुवर्णमाक्षिक, इत्यादी औषधयुक्त लोहाचे अरिष्ट. **गुण**—अग्निवर्धक, कृशता करणारे. सूज-गुल्म-पांडु-कुष्ठ-प्रमेह-प्लीहा-उदर-विषमज्वर-डोळे येणे-बरे करणारे.

**लोहित**–पु., वनस्पति० इक्षुभेदः, रक्तेक्षुः
तांबडा ऊस.
( रक्तेक्षु)द्र०' इक्षु ' ( रा. १४.१८९ ) लाल ऊस.
कन्द० रक्तपिण्डालुः ( रापरि. ७.२६ )
रताळू, रताळे.
धान्य० व्रीहिः ( रा. १६.८७ ) तांबसाळ.
न., वनस्पति० तृणकुङ्कुमम् ( रा.१२.२३ )
गवती केशर.
वृक्ष० हरिचन्दनम् ( रा. १२.१२ ) पिवळे चंदन.
वृक्ष० रक्तचन्दनम् द्र० ' चन्दनं ( ध. ३.४ )
रक्तचंदन.
शारीर० रक्तधातुः ( चनि. २.४; अहसू. २७.१-२
रक्त.
रूप० रक्तवर्णम् लक्षण० ( चनि. २.६, अहसू. २७.२ )
लाल रंगाचे.
न., स्त्रीशोणित० आर्तवम्, ऋतुकालोद्भवम् ( सुशा. १.१६ )
रज, रजस्राव, स्त्रियांचा मासिक स्राव.

**( लोहिता )**–स्त्री., शारीर० त्वग्भेदः, द्वितीया त्वक्, सा व्रीहेः षोडशभागप्रमाणा, तिलकालकन्यच्छव्यङ्गाधिष्ठाना ( सुशा. ४.४ )
दुसरी त्वचा. प्रमाण ११⁄१६ तांदूळाइतकी. या त्वचेवर तीळ, लांछन, वांग उत्पन्न होतात.
वनस्पति० पुनर्नवाभेदः, क्रूरः, द्र० ' पुनर्नवा ' ( रा. ५.४०६ ) लाल पुनर्नवा.

**–क्षया**–स्त्री., रोग० योनिव्यापद्० तल्लक्षणम्—वातपित्ताभ्यां रजः क्षीयते, सदाहकार्श्यं वैवर्ण्यं च ( असंउ. ३८ )
योनिविकार. वातपित्तांनी रज क्षीण होते, कृशता, वर्णाचा बिघाड व दाह.

**–क्षरा**–स्त्री., रोग० पित्तजयोनिरोगेष्वेकः, तल्लक्षणम्—यदा दाहयुक्तमार्तवं स्रवति तदा दाहपाकादियुता, इयं योनिः लोहितक्षरेति ज्ञेयम् ( सुउ. ३८.१२ )
एक पित्तज योनिरोग. दाहयुक्त रजःस्राव व पाक इत्यादी होतात.

**–गन्धास्यता**–स्त्री., रोग० मुखस्य लोहसमानगन्धत्वम्, रक्तसमानगन्धत्वम्, गन्धोऽत्र आमगन्धः, चत्वारिंशत्पित्तविकारेष्वेकः (चसू. २०.१४; असंसू. २० )
तोंडाला लोखंडासारखा वास येणे. रक्तासारखा वास येणे. चाळीस पित्तविकारांपैकी. या ठिकाणी गंध शब्दाने आमाचा गंध समजावा.

**–चन्दन**–न., वृक्ष० चन्दनभेदः, रक्तचन्दनम्, द्र० ' चन्दन ' ( चचि. ४.१०२ ) रक्तचंदन.

**–पित्त**–न., रोग० रक्तपित्तम् ( सुउ. ४५.१३ )
रक्तपित्त.

**–पुष्पी**–स्त्री., वनस्पति० उष्ट्रकाण्डी ( रापरि. १०.४३ ) लाल फुलाची वनस्पती.

**–पूर्णकोष्ठता**–स्त्री., लक्षण० रक्तपूर्णोरस्कता ( सुशा. ६.२५ )
रक्ताने भरलेले उर. रक्ताने भरलेला कोष्ठ.
**रक्तपूर्णोदरत्वम्** ( सुशा. ६.२६ )
पोटात रक्त भरलेले असणे.

**–मत्स्य**–पु., रोहितमत्स्यः (चनि. २.६) द्र० 'मत्स्य'
लाल मासा.

**–मत्स्यगन्ध**–वि., लक्षण० लोहितमत्स्य गन्ध इव गन्धो यस्य तत् ( असंनि. ३ )
लाल माशाच्या वासासारख्या वासाचा.

**–मत्स्यगन्धित्व**–न., लक्षण० लोहितमत्स्यसमानगन्धवत्त्वम् ( चनि. २.६ )
लाल माशाच्या वासाप्रमाणे वास असणे.

**–मृत्**–स्त्री., खनिज० गैरिकम् ( चचि. २३.१०१ )
काव, गेरु.

**–मेह**–पु., रोग० प्रमेहभेदः, पित्तजः, रक्तमेहपर्यायः, लक्षणम्–पित्तस्य प्रकोपेण नरः विस्रं लवणमुष्णं च रक्तं मेहति ( चनि. ४.२५; चसू. १९.४( ९ ) द्र० ' प्रमेह ' )
पित्तज प्रमेहाचा एक प्रकार. रक्तमेह. दुर्गंधी, खारट, उष्ण, व लाल लघ्वी होते.

**–राजी**–वि., **रक्तवर्णा रेखा शरीरे यस्य सः ( शकली मत्स्यः )** ( चसू. २६.८३ )
ज्याच्या शरिरावर लाल रेषा असतात. तो मासा, शकली मासा.

**–वह**–वि., **शारीर० शोणितवहम्** ( स्रोतः ) ( चनि. २.४ )
रक्तवाही स्रोतस.

**–शालि**–पु., **धान्य० लोहितकपर्यायः. रक्तशालिः** ( चसू. २५.३८; सुसू. ४६.४ )
लाल साळ, तांबसाळ.

**लोहितक**–पु., **धान्य० रक्तशालिः, गुणाः–शूकधान्यानां पथ्यतमत्वेन श्रेष्ठतमः** ( चसू. २५.३७ )
**दोषघ्नश्चक्षुष्यो बलवर्णकृत् स्वर्यो हृद्यस्तृषापहः शुक्रलो मूत्रलो व्रण्यो ज्वरहरः सर्वदोषविषापहश्च** (सुसू. ४६.६-७)
तांबडी साळ. कुसळे असलेल्या धान्यात अति पथ्यकर म्हणून सर्व श्रेष्ठ. दोषघ्न, बलवर्णकर, हृदय डोळे यांना हितकर, शुक्रवर्धक, मूत्रल, वर्ण सुधारणारा, ज्वरविषनाशक सर्वदोषहर.

**(लोहितिका)**–स्त्री., **शारीर० सिराभेदः कर्णस्था लोहितवर्णा सिरा । तस्या व्यधादुपद्रवाः–मन्यास्तम्भाऽपतानकशिरोग्रहकर्णशूलाः** (सुसू.१६.५)
शिरेचा प्रकार. कानाच्या पाळीतील लाल शीर. ती विंधली तर मान ताठरणे, अवयवांना तणावे ( धनुर्वात ) डोके जखडणे, व कानात शूळ होतो.
**वनस्पति० मञ्जिष्ठा** ( सुचि. ११.१० ) मंजिष्ट.

**लोहिताक्ष**–पु., **सर्प० दर्वीकरभेदः** ( सुक. ४.३४ (१) ) **द्र० 'सर्प'**
लाल डोळ्यांचा नाग.

**लोहिताक्षमर्मन्**–न., **शारीर० तस्य स्थानम्–ऊर्व्या ऊर्ध्वमधोवङ्क्षणसन्धेः ऊरुमूले लोहिताक्षं नाम मर्म । सक्थिमर्मेदं, सिराममर्मभेदः मानम्–अर्धाङ्गुलम्, वामदक्षिणभेदेन द्वे मर्मणी। विद्धे लक्षणम्–लोहितक्षयेण पक्षाघातः सक्थिशोथः वैकल्यं च** ( सुशा. ६,६,७,१२,१३,२४,२९; असंशा.७ )
एक मर्मस्थान. हे मर्म मांडीच्या वर व जांघेच्या संधीखाली, मांडीच्या मुळात आहे. प्रमाण अर्धांगुळ डावे उजवे अशी दोन. मांडीच्या मर्मावर झालेल्या आघाताने रक्तक्षय होऊन, मांड्या निकामी, सूज व विकलता.

**–सिरा**–स्त्री., **शारीर० अव्यध्यसिरा, प्रत्येकशाखायामेका, तस्याः स्थानम्–ऊरुमूले ऊरुमर्मोर्ध्वमधो वंक्षणसन्धेः। बाहुमध्येऽपि तथैव । लोहिताक्षसिरा सक्थिमध्ये बाहुमध्ये** ( सुशा. ७.२२ )
वेध करण्यास अयोग्य शीर. प्रत्येक शाखेत एक. मांडीच्या मुळात मर्माच्या वर व जांघाडाच्या संधीच्या खाली. असेच हातात.

**लोहितागस्त्य**–पु., **वृक्ष० रक्तागस्त्यः द्र० 'अगस्त्य'** ( र. ३०.१०७ )
लाल हदगा.

**लोहिताङ्ग**–पु., **वनस्पति० कम्पिल्लकः** ( ध. ३.१३८ )
कपिला.

**लोहितार्मन्**–न., **नेत्ररोग० नेत्रशुक्लभागगतोऽयम्, क्षतजार्मपर्यायः । लक्षणम्–नेत्रस्य शुक्लभागे यन्मांसं पद्मपत्रप्रभं वृद्धिमुपैति, तल्लोहितार्म** ( सुउ. ४.५ ) **नेत्रशुक्रवल्लेखनाञ्जनेनोपकरणीयम्** ( सुउ. १५.१७ )
डोळ्याच्या पांढऱ्या भागात होतो, याला क्षतजार्मही म्हणतात. डोळ्याच्या पांढऱ्या भागात कमळाच्या पाकळी सारखे जे मांस वाढते ते लोहितार्म. नेत्रशुक्र या रोगासारखा लेखन व अंजनाचा उपचार करावा.

**लोहितालु**–पु., **वनस्पति० कन्दोऽयं रक्तपिण्डालुः** ( रापरि. ७.२६ ) लाल रताळू.
**फोण्डालुः** ( रापरि. ७.३० )
लाल व मऊ पानांचा लाल आळू.

**लोहितेक्षु**–पु., **वनस्पति० रक्तेक्षुः, द्र० 'इक्षु'** ( रा. १४.१८९ ) लाल ऊस.

**लोहिनी**–स्त्री., **शारीर० त्वग्भेदः लोहिता त्वक्** ( असंशा. ५ ) **द्र० 'त्वच्'**
त्वचेचा प्रकार.

**लोहोच्छिष्ट**–न.,**खनिज० मण्डूरम्** ( ध. ६.३५ ) मंडूर.

**लोहोत्थ**–न., **खनिज० मण्डूरम्** ( ध. ६.३५ ) मंडूर.

**लोहोदक**–न., **सिद्धोदक० अगरोः सिद्धमुदकम्** ( चसू. २३.१८ ) अगरूचे उकळून केलेले पाणी.

**लौकिक**–वि., **अपरीक्षकाणां लोके संजातम्, अपरीक्षका एवहि वर्तमानमात्रे प्रवर्तन्ते-परीक्षकास्तु जन्मान्तरकारिण्येव** ( चक्र. चसू, २७.३५० ) **अपरीक्षकश्च रजोमोहावृतात्मा** ( चक्र. चसू. २८.३६ )
अपरीक्षक म्हणजे रजस्तमोदोषांनी व्याप्त अशा जगात झालेले व परीक्षक म्हणजे जन्मांतर

सुद्धा जाणतात म्हणून त्यांच्या विषयींचे जे ते लौकिक नव्हे. कारण ते रजस्तमोगुणाधीन नसतात.

**लौकिकार्थ**-पु., **लोकाचारः** ( अहृसू. २.४५ )
लोकाचार, लोकांचा आचार.

**लौक्य**-वि., **लोकानुगतम्** ( चवि. ८.१४ )
लोकपरंपरेने चालत आलेले.

**लौल्य**-न., **लोलुपत्वम्** ( चसू. २५.४० ) '**लौल्यं क्लेशकराणां श्रेष्ठम्** ' ( असंसू. १३ )
लोलुपता. ही क्लेशकारकांमध्ये श्रेष्ठ.
**लक्षण० सर्वरसेषु लोलुपत्वम्, तिक्ताऽम्लादिरसाऽभिलाषः** ( सुउ. ४०.१७४ ) **सर्वरसाऽभिकाङ्क्षा रसेषु गृद्धिः** ( सुनि. ६.१३ )
सर्वरसांची अभिलाषा. सर्वरसांची फार आवड-लोलुपता.

**लौह**-वि., **लोहस्येदं लोहमयं वा लौहम्**
(चचि. १.(३)-२०; सुसू. ७.७; र.५.११७.१२०)
लोहाचे ते, लोहमय.

**(लौही)**-स्त्री., **लोहपात्रम्** ( अहृसू. ३०.१५ )
लोखंडाचे भांडे.

**-दर्वी**-स्त्री., **पात्र० लोहमयी पाकक्रियोपयोगिनी खल्वाऽग्रमुखपात्रयुक्ता पश्चाद्दीर्घदण्डा भवति**
( र. १३.८०-८१ )
लोखंडाची पळी. औषधक्रियेत पाक इ० करताना उपयोगी अशी, पुढे खलासारखी खोलगट व मागे लांब दांडा असलेली ( पळी ).

**-पर्पटिका**-स्त्री., **पारदयोग० लोहपारदगंधकभृङ्गकादिसाधिता इयं स्वरभेदे उपयुक्ता**
(र. १३.८०-८१)
पारा, गंधक, लोह इत्यादीयुक्त पर्पटी. स्वर फुटण्यावर उपयुक्त.

**-मल**-पु., **खनिज० मण्डूरम्** ( र. १५.६८ ) मंडूर.

**-रसायन**-न., **योग० लोहपत्रत्रिफलागोमूत्रक्षारादिसाधितमिदं लौहादिरसायनम् बलादिवर्धनम्**
(चचि. १(३)१५-२३)
लोह, त्रिफळा, गोमूत्रादिसाधित. सर्व धातूंचा उत्तम परिपोषक.

**-शलाका**-स्त्री., **लोहस्य लोहमयी वा शलाका**
(चचि. २५.८२) लोखंडाची सळई.

**लौहितक**-न., **कृत्रिमधातु० पित्तलम्** ( रा. १३.१७ )
पितळ.

**लौहित्य**-पु., **धान्य० लौहितशालिः लौहितकः, गुणाः-कषायो लघुः मधुरः वातलश्च** (चसू. २७.१७)
लाल साळ, तांबसाळ. **गुण**—तुरट, गोड, हलकी, वातुळ.

## व

**वंश**-पु., **वनस्पति० वेणुः, नाडीस्वेदार्थमुपयुक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. १४.३१ ) **गुणाः-अम्लः, कषायः, कटुस्तिक्तः, शीतो, भेदनो, विष्टम्भी, पित्तघ्नो मूत्रकृच्छ्रप्रमेहार्शोदाहरक्तविकारव्रणशूलहरश्च**
( ध. ४.१३७ )
हिं.—बांस.
**म.—वेळू.**
गु.—वांस.
बं.—वांश.
ता.—मूंकिल.
वेळू. नळीने शेकावयाचे एक साधन. **गुण**—आंबट, तुरट, तिखट, कडु, थंड, मळ फोडणारा, अवरोधक, पित्तनाशक, उन्हाळे, प्रमेह, मूळव्याध, दाह, रक्तविकार, व्रण, शूलहारक.
**स द्विविधः घनवंशो रन्ध्रवंशश्च** (असंसू. २६.६; अहृसू. १७.८ )
हा दोन प्रकारचा. एक भरीव व दुसरा पोकळ.
**वनस्पति० सर्जकः** ( रा. ९.२०५; र. ८.३६ )
राळ.
**इक्षुः** ( ध. ४.१२० ) ऊस.
**वेणुजः** ( रा. १६.१२६ ) जव, वेळूचे बी.

**-करीर**-पु., **वनस्पति० वंशाङ्कुरः, सामान्यगुणाः-कफहरः सृष्टमूत्रपुरीषश्च। विशेषगुणाः-कफलो रसपाकतो मधुरो विदाही, वातलः कषायो विरूक्षणश्च** ( सुसू. ४६.२९०; अहृसू. ६.९९ )
वेळूचे कोंब. **गुण**—कफहर, मळमूत्र साफ करणारे, गोड, पचल्यावरही गोड, छातीत जळजळ करणारे, रूक्षता करणारे, वातुळ व कफवर्धक.

**-कर्पूररोचना**-स्त्री., **वनस्पति० वंशरोचना**
( रा. ६.८६ ) वंशलोचन.

**-क्षीरी**-स्त्री., **वनस्पति० वंशरोचना** ( ध. २.५५ )
वंशलोचन.

**-गा**-स्त्री., **वनस्पति० वंशरोचना** ( रा. ६.८५ )
वंशलोचन.

**-ज**-पु., **वनस्पति० वेणुजः** ( रा. १६.१२६ )
वेळूचे बी.

**(-जा)**-स्त्री., वनस्पति० **वंशरोचना** ( ध. २.५५ )
वंशलोचन.

**-तण्डुल**-पु., वनस्पति० **वेणुजः** ( रा. १६.१२६ )
वेळूचे बी.

**-दल**-न., **वंशस्य खण्डम्** ( असंसू. २६.१० )
वेळूचा तुकडा.

**(-दला)**-स्त्री., वनस्पति० **वंशपत्री** ( रापरि. ८.५४)
बांबूच्या पानासारखी वनस्पती.

**-धान्य**-न., वनस्पति० **वेणुजः** ( रा. १६.१२६ )
वेळूचे बी.

**-पत्रक**-पु., वनस्पति० **श्वेतेक्षुः** ( रा. १४.१८१ )
पांढरा ऊस.

**-पत्री**-स्त्री., वनस्पति० **गुणाः– सुमधुरा, शिशिरा, रुच्या, पशुदुग्धदायिनी, पित्तनाशिनी, रक्तदोषहरा** ( रापरि. ८.५४ )
बांबूच्या पानासारखी वनस्पती. गुण– चांगली गोड, थंड, रुचकर, पित्त व रक्तदोषनाशक, पशूंना दूध देणारी.
वनस्पतिनिर्यास० **नाडीहिङ्गु** ( ध. २.४० )
एक प्रकारचा हिंग.

**-पीत**-पु., वनस्पति० **कणगुग्गुलुः** ( रा. १२.१८६ )
एक प्रकारचा गुग्गुळ.

**-रोचना**-स्त्री., निर्यास० ( ध. २.५५ ) गुणाः– **कषाया मधुरा तिक्ता शीता रूक्षा बल्या बृंहणी रक्तशुद्धिकरी तापहरा कासमूत्रकृच्छ्रक्षयश्वासहरा च** ( ध. २.५५; असंसू. १२.२९ )
वंशलोचन. **गुण**—तुरट, गोड, कडू, थंड, रूक्ष, बलवर्धक, पौष्टिक, रक्तशुद्धिकारक, तापनाशक, खोकला, उन्हाळे, क्षय व श्वास नाशक.

**-लेख**-पु., **वंशतनुवल्कः** ( इन्दु ) ( असंउ. ४४ )
बांबूची पातळ साल.

**-लेखन**-न., वनस्पति० **वंशनीलिका** ( चचि. १८.७३ ) एक वनस्पती.

**-लोचन**-न., भैषज्य० **वंशरोचना** ( चचि. २३.७१ )
वंशलोचन.

**-विदल**-न., **वंशकम्बिका** ( सुचि. २७.८ )
वेळूची कांब.

**-शर्करा**-स्त्री., निर्यास० **वंशरोचना** ( रा. ६.८६ )
वंशलोचन.

**-सम्पन्ना**-वि., **वंशवत् उत्कृष्टा सरलतीक्ष्णत्वेन ( नासा )** ( चशा. ८.५१ )
वेळू सारखे उत्कृष्ट सरळ धारदार. (नाक)

**वंशक**-पु., **इक्षुभेदः, स च सुशीतो मधुरः स्निग्धो बृंहणः श्लेष्मलः सरोऽविदाही गुरुर्वृष्यः किञ्चित्सक्षारो वंशको मतः** ( सुसू. ४५.१५१-५२; चसू. २७.२३८ ) द्र० **'इक्षु'**
उसाचा प्रकार. **गुण**— चांगलाच थंड गोड, स्निग्ध, जड, पौष्टिक, सारक, घशाशी जळजळ न करणारा, शुक्राला हितकर, किंचित खारट कफकर.

**वंशाग्र**-न., वनस्पति० **करीरः** ( ध. ४.१४० ) नेवती.

**वंशाङ्कुर**-पु., वनस्पति० **वंशाग्रम्** ( रा. ७.२१९ )
बांबूचा अंकुर.

**वंशाङ्कुरपरु**-पु., वनस्पति० **वंशाग्रम्** ( ध. ४.१४० )
बांबूचा अंकुर.

**वंशान्तर**-पु., वनस्पति० **नलः** ( रा. ८.२२१ ) नळ.

**वंशावलेख**-पु., **हस्तादिना अवलिख्य निष्कृष्यते इति अवलेखः, वंशत्वक्** ( सुचि. १८.२० )
बांबूची साल.

**वंशावलेखन**-न., **वंशाच्छोलनम् वंशत्वक्** ( ड. सुउ. २१.१५ ) बांबूची साल.

**वंशाह्व**-पु., वनस्पति० **वेणुजः** ( रा. १६.१२६ )
वेळूचे बी.

**वंशिर**-न., भैषज्य० **सामुद्रलवणम्** ( रा. ६.४२ ) मीठ.

**वंश्या**-स्त्री., निर्यास० **वंशरोचना** ( ध. २.५६ )
वंशलोचन.
वनस्पति० **दधिपुष्पी** ( रा. ७.२०४; पा. ३६ )
एक प्रकारची खाजकुहिली.

**वक्तक**-पु., वनस्पति० धान्य० **व्रीहिः** (रा. १६.११२)
तांदुळ ( व्रीहीजातीचा )

**वक्तृ**-वि., **वचनकर्महेतुः ( क्षेत्रज्ञः )** ( सुशा. ३.४ )
बोलणारा, बोलणे या कर्माचा कारक आत्मा.

**वक्त्र**-न., **मुखम्** ( र. ३.११०; सुनि. १.६९ ) तोंड.

**-कटक**-न., **अश्वादेः वक्त्रस्थं लोहमयं मण्डलम्, खलिनम्** ( अहसू. २८.२९; असंसू. ३७.१६ )
घोडा इत्यादींचा लगाम तोंडातील लोखंडाचे कडे.

**-मण्डिका**-स्त्री., बालग्रह० **मुखमण्डिका** ( सुउ. २७.१५ )
एक बालग्रह.

**-रस**-पु., **मुखे उत्पद्यमानो रसो, ज्वरादि व्याधिजन्यस्तिक्तादिः** ( चचि. ३.१५८ )
ज्वर इत्यादी विकारात तोंडात होणारा कडु इत्यादी रस.

**-वादित्र**-न., वक्त्रमेव वादित्रम् ( सुचि. २४.९५ )
तोंडरूपी वाद्य.

**-वास**-पु., वनस्पति० नारङ्गः (रा. ११.२४) संत्रे.

**-शल्या**-स्त्री., वनस्पति० काकादनी
( ध. ४.२७; पृ. १३९ )
एक प्रकारची काकमाची.
**श्वेतकाम्भोजी** ( ध. ४.३१; पृ. १४० )
एक प्रकारची काकमाची.

**-शोधन**-न., वनस्पति० भव्यम् ( ध. ५.३९ )
कर्मर, गजपिंपळी.

**-शोधिन्**-पु., वनस्पति० जम्बीरः ( ध. ५.१४ )
इडनिंबु.

**-शोष**-पु., आननशुष्कत्वम्, मुखशोषः
( सुउ. ५२.९ )
तोंड सुकणे.

**वक्त्राधिवासन**-पु., वनस्पति० नारङ्गः
( ध. ५.२० ) संत्रे.

**वक्त्रार्धवक्रता**-स्त्री., अर्धमुखवक्रता, अर्दितरोगस्य लक्षणम् ( सुनि. १.७० )
अर्धे तोंड वाकडे होणे. अर्दितरोगाचे लक्षण.

**वक्र**-न., बस्तिनेत्रदोषः ( चसि. ५.४ )
बस्तियंत्राच्या तोंडाच्या नळीचा दोष. ( वाकडेपणा. )
**वनस्पति० तगरम्** (ध. ३.५३; सुक. ६.३) तगर.
**अस्थिभङ्गस्य प्रकारः, आभुग्नमविमुक्तास्थि वक्रम्**
( सुनि. १५.१०; असंउ. ४४)
हाडाच्या भंगाचा प्रकार. सुटे न झालेले भंगलेले, वाकडे झालेले हाडाचे तोंड ( टोक )

**-कण्ट**-पु., निर्यास० खदिरः ( रा. ८.३१ ) खैर.

**-कण्टक**-पु., वनस्पति० बदरम् ( रा. ११.१५७ )
बोर.

**-ग**-वि., समाक्रान्तं राशिं मुक्त्वा पुनः पूर्वमेव मुक्तराशिं नक्षत्रं वा याति सः ( ग्रहः )
( सुसू. ३२.४ )
एक राशि भोगून पुन्हा पूर्वीच्याच त्या भोगलेल्या राशीत किंवा नक्षत्रात मागे येणारा ( ग्रह )

**-दन्ता**-स्त्री., वनस्पति० दन्ती (रा. ६.३३८) दांती.

**-ध्वज**-पु., वक्रमेढ्रः ( असंशा. २.४३ )
वाकडे शिश्न ( जननेंद्रिय ) आहे असा.

**-पुष्प**-पु., वनस्पति० पलाशः ( रा. १०.२७४ )
पळस.
**अगस्त्यः** ( रापरि. १०.१३ ) हदगा.

**वक्रिन्** वि., वक्रध्वजः वक्रध्वजवान् गर्भः
( चशा. २.२० ) वाकडे शिश्न असलेला.

**वक्षस्**-पु., शारीर० स्तनान्तरम् ( सुउ. ५२.११ )
उर. छाती.
**उरः** ( सुचि. ३.५० ) छाती.
**हृदयम्** ( सुसू. २७.९; असंशा. ७.११ ) हृदय.

**-तोद**-पु., लक्षण० अशीतिवातविकारेष्वेकः, वक्षसि तोदः ( चसू. २०.११; असंसू. २०.१३ )
ऐशी वातविकारांपैकी एक. छातीत टोचणी.

**( वक्षो )-मर्मन्**-न., उरःस्थमर्माणि (सुशा. ६.१०-११)
छातीतील मर्मे.

**वक्षउद्धर्ष**-पु., लक्षण० वक्षसः उद्धर्षः, नाम अल्पीयान्-शोफः, अशीतिवातविकारेष्वेकः ( चसू. २०.११ )
ऐशी वातविकारांपैकी एक. छातीत येणारी थोडी सूज.

**वक्षउपरोध**-पु., लक्षण० अशीतिवातविकारेष्वेकः वक्षस उपरोधः ( चसू. २०.११; असंसू. २०.१३ )
एंशी वातविकारांपैकी एक. छातीत अडल्या प्रमाणे होणे, रोकणे.

**वङ्कनाल**-न., नलिका० मूषानिर्माणोपयोगि मृत्तिकया निर्मितं, पञ्चाङ्गुलमधोनामितमरत्निप्रमितं नालम्
( र. १०.४६ )
एक पोकळ नळी. मूस करण्याच्या उपयोगी. मातीने केलेली सरासरी एक हात लांबीची पांच अंगळे खाली वाकवलेली नळी.
स्त्री., **रससाधनोपयोगिनी वक्रा नलिका**
( र. ६.४५ )
पारा सिद्ध करण्यास उपयोगी वाकडी नळी.

**वङ्क्षण**-पु., शरीरे स्थानविशेषः ( चसू. १४.१० )
जांघ. शरिराचे एक स्थान.
**ऊरुसंधिः** ( चचि. ३०.१७२-७३; सुसू. ५.१३ )
मांडीचा सांधा.
**सक्थिसंधिः** ( चशा. ७.११ ) मांडीचा सांधा.
**गण्डकः** ( ड. सुउ. ४२.१३४; अहसू. ४.४ )
गंडक. जांघ.

**-ज**-पु., वङ्क्षणे जातः ( चसू. १७.१०१ )
जांघेत झालेला.

**-संधि**-पु., मेढ्रसक्थिसन्धिदेशः ( सुनि. १२.६
( असंशा. ७.४ )
शिश्न व मांडी यातील संधिप्रदेश.

**वङ्क्षणानाह**–पु., लक्षण० अशीतिवातविकारेष्वेकः जङ्घाया आनाहो नाम शोफः ( चसू. २०.११ ) ( असंसू. २०.१३ )

ऐशी वात विकारांपैकी एक. जांघेत येणारी सूज.

**वङ्ग**–न., खनिज० रङ्गम् ( र. १.४१; रा. १३.२१ ) तस्य शोधनम्–वह्नियोगान् वङ्ग द्रावयित्वा त्रिवारं षोडशांशहरिद्राचूर्णसहिते निर्गुण्डिकास्वरसे क्षिपेत् । एवं तत् शुद्धं भवति ( र. ५.१६४-६५ ) तस्य मारणम्–खर्परे वङ्गं द्रावयित्वा तत्र षोडश· भागं रसं ( पारदं ) क्षिपेत् । ततस्तत्राल्पमल्पं शुद्धं हरितालं दत्वाऽगस्त्यवृक्षस्य काष्ठेन मर्दयित्वा तस्य भस्म कुर्यात् । तत् रसादिषु शस्तं वर्तते । ( र. ५.१६८ ) खुरकं मिश्रकं चेति द्विविधं वङ्ग-मुच्यते । खुरकं गुणैः श्रेष्ठं मिश्रकं नरसेवितम् ( भा. प्र. ) गुणाः–कटु तिक्तकषायं लवणं शीतं च, (रा.) उष्णं रूक्षं सरं कान्तिकरं रसायनं कफपित्तघ्नं प्रमेहकृमिदाहपाण्डुहरं च ( ध. ६.१३ )

हिं.—रांगा.

**म.—कथील.**

गु.—कथीर.

बं.—रांग.

**कथील— शुद्धि**–कथील पातळ करून निर्गुंडीच्या रसात १६ वा हिस्सा हळद घालून त्यामध्ये तीन वेळा विझवावे. ते शुद्ध होते. **मारण**– खापरात कथील पातळ करून सोळावा हिस्सा पारा घालावा त्यात शुद्ध हरताळ थोडे थोडे घालून हदग्या दांड्याने घोटून भस्म करावे. ते पारा इत्यादींमध्ये उपयोगाला योग्य आहे.

**कथिलाचा प्रकार** २— खुरक आणि मिश्रक. पैकी खुरक गुणांनी श्रेष्ठ. **गुण**– तिखट, कडू, तुरट, खारट थंड, रूक्ष, सारक, कांतिवर्धक, रसादिधातूंची वृद्धि करणारे, कफपित्तनाशक. प्रेमह कृमि, दाह, पाण्डू नाशक.

**वङ्गेश्वर**–पु., भैषज्ययोग० पारदवंगयुक्तः प्लीहगुल्मोदर-नाशनोऽयम् ( र. १८.५६ )

पारा, कथील, तांबेयुक्त एक योग. प्लीहा, गुल्म, उदर नाशक.

**वच**–पु., वनस्पति० वचा ( र. १८.४७ ) वेखंड.

**वचन**–न., वागिन्द्रियस्य विषयः, भाषणम् (सुशा. १.५) वाक् इंद्रियाचा विषय, भाषण, बोलणे.

**–परीक्षा**–स्त्री., (परिव०) प्रश्नपरीक्षा (चचि. २५.२३) प्रश्न विचारून करावयाची परीक्षा.

**–शक्ति**–स्त्री., अर्थकीर्तनसामर्थ्यम् ( चवि. ८.५ ) अर्थ सांगण्याचे सामर्थ्य.

**वचा**–स्त्री., वनस्पति० गुणाः–कटुस्तिक्तोष्णा, वमनी, कण्ठ्या, मेध्या, वातकफघ्नी, कृमिविबन्धाध्मानशूला-मग्रन्थिशोफज्वरातीसारभूतहरा (ध.२.६;चसू.३.५) ग्रन्थिलाऽप्युग्रगन्धा प्रज्ञावर्धिन्योषधिः ( र.१३.७१ )

हिं.—बच.

**म.—वेखंड.**

गु.—बज.

बं.—बच.

ता.—वचंपु.

**वेखंड**— गुण– तिखट, कडु, उष्ण, वामक, घशाला–बुद्धीला–हितकर. कफवातघ्न, कृमि, अवरोध, पोटफुगी, शूल, कच्ची· गाठ, सूज, ज्वर, अतिसार, भूतबाधाहर. उग्रवासाची. बुद्धिवर्धक.

**बस्तिषूपयुज्यते** ( चसि. ३.१४ )
बस्ति देण्याच्या औषधांत उपयुक्त.

**विरेचनार्थमुपयुज्यते** ( चसू. २.९ )
रेचकाकरिता उपयुक्त.

**स्तन्यदोषहरणार्थमुपयुज्यते** ( सुचि. १७.४४ )
अंगावरच्या दुधाचे दोषनाशक.

**व्रणशोधनचूर्णे उपयुज्यते** ( सुसू. ३७.१९ )
व्रणाचे दोषशोधक चूर्णामध्ये घातले जाते.

**धूपनद्रव्यम्** ( सुसू. ५.१८ ) धुरीचे द्रव्य.

**श्लेष्मशूलप्रशमनी** (सुउ.४२.१११;असंसू.१६.४०) कफशूल नाशक.

**उग्रगन्धा** (र. १२.१२१-२२) उग्रवासाची. वेखंड.

**वचा**–स्त्री., वनस्पति० ( र. १८.४७ ) वेखंड.

**–युज्**–स्त्री., वनस्पति० वचाद्वयम्, वचा पारसी-कवचा चेति ( र. २३.६५-६८ )
दोन प्रकारचे वेखड. वेखंड व फारसी वेखंड.

**वचादिगण**–पु., द्रव्यगण० वचामुस्तातिविषाभयाभद्र-दारूणि नागकेशरं चेति । तद्गुणाः–स्तन्यशोधन आमातीसारनाशन आमसंसृष्टदोषाणां पाचनश्च ( सुसू. ३८.२६-२८ )

वेखंड, नागरमोथा, अतिविष, हिरडा, देवदार व नाग केशर ही वचादिगणातील औषधे होत. गुण– दूध शुद्ध करणारे. आम-अतिसार नाशक. आमयुक्त दोषांचे पाचक.

**वचाम्बु**–न., वचाक्वाथः, वातजारोचके वमनार्थमसौ योज्यः ( सुउ. ५७.६ )
वेखंडाचा काढा. वातज, रुचिनाशावर, वांतीकरितां हा द्यावा.

**वज्जर**–न., खनिज० तीक्ष्णलोहप्रकारः ( ध. ६.२८ )
पोलादाचा प्रकार.

**वज्र**–न., खनिज० नरजातिकं वज्रमष्टास्त्रमष्टकोणमष्टफलकमष्टपार्श्वं षट्कोणमतिदेदीप्यमानं मेघयुक्तेन्द्रधनुर्वत् प्रकाशमानं तथा वारितरं नामातिलघु वर्तते (र. ४.२९) स्त्रीजातिकं वज्रमाकारेण चिपिटाकारं गोलाकारमायतं लम्बायमानं वा वर्तते। (र. ४.३० ) नपुंसकजातिकं वज्रमाकारेण वर्तुलाकारं तथा कुण्ठितकोणाग्रभागं गुरु च वर्तते ( र. ४.३१ ) नरादिकं तद् वज्रमेकैकं प्रत्येकं चतुर्विधं वर्तते। श्वेतरक्तपीतकृष्णभेदेन तद् ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्राभिधं वर्तते । (१) श्वेतो–विप्रः (२) रक्तः–क्षत्रियः (३) पीतो–वैश्यः (४) कृष्णः –शूद्रः । वज्रं निजनिजवर्णफलप्रदम् ब्राह्मणो ब्राह्मणस्य, क्षत्रियः क्षत्रियस्य फलप्रदं भवति। अयं साधारणो नियमः । परं श्रेष्ठश्रेष्ठजातिकं वज्रं नीचनीचवर्णफलप्रदं भवति। विप्रहीरकं सर्वत्र, फलदमिति भावः ( र. ३३.३४ ) तस्य भेदाः– नर–नारी–नपुंसकभेदेन त्रिविधं वर्तते। रसेन विपाकेन वीर्येण च पूर्वं पूर्वं वज्रं श्रेष्ठं वर्तते ( र. ४.२९ ) तस्य गुणाः– आयुष्प्रदं शीघ्रमुत्तमगुणप्रदायि वृष्यं पौष्टिकं सर्वदोषप्रशमनं समस्तरोगहरं, पारदस्य बन्धनं मारणं दीपनं मृत्युहरं च ( र. ४.३५ ) तस्य प्रयोगः– त्रिगुणेन पारदेन सह वज्रं संमर्द्य ततो गुटिकीकृतं तद् योजनीयम् मुखे धृता गुटिका चलद्दन्तविबन्धनं करोति। ( र. ४.४८-४९ ) तस्य शोधनम्–कुलत्थक्वाथे कोद्रवक्वाथे वा एकप्रहरपर्यन्तं दोलायन्त्रेण स्वेदितं वज्रं शुद्धं भवति ( र. ४.३८ ) तस्य मारणविधिः– मत्कुणरक्तेन वज्रं चतुर्वारं प्रथमतो भाव्यम्। मदनफलरसेन भूनागान् पिष्ट्वा तेन कल्केन वज्रं लिप्त्वा विंशतिवारं पुटं ( गजं वाराहं वा ) दद्यात् अनेन वज्रं भस्मीभवति ( र. ३९.४७ ) तस्योपयोगः– पुंजातिकं पुंसि स्त्रीजातिकं स्त्रियां नपुंसकजातिकं च नपुंसके योज्यम्। एतन्नियमभङ्गात् वज्रं फलप्रदं न भवत्यन्यत्र पुंवज्रात्, पुंवज्रं सर्वत्रैव योजनीयम् ( र. ४.३२ )
आ. को. म. १५८
हि.—हिरा.
**म.—हिरा.**
गु.—हिरो.
बं.—हिरे.
हिरा. हिऱ्याच्या तीन जाती. (१) नर (२) नारी व (३) नपुंसक. **नर**—आठकडा, आठकोन, आठ मुख्य पैलू आणि आठ लहान पैलू युक्त. अतिशय दैदीप्यमान. ढगानी युक्त. इन्द्रधनुष्याप्रमाणे अनेक रंगाच्या छटानी युक्त–प्रकाशमान तसेच पाण्यावर तरणारा म्हणजे हलका असतो. **नारी**—जातीचा हिरा–आकाराने चापट, गोल, चौकोनी किंवा लांबट असतो. **नपुंसक**—जातीचा हिरा–गोलाकार, खडबडीत, कोनाची टोके असलेला, आणि जड असतो. हे प्रत्येक जातीचे हिरे चार प्रकारचे. पांढरा, तांबडा, पिवळा व काळा. ते क्रमाने ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र होत. ब्राह्मण ब्राह्मणाला, क्षत्रिय क्षत्रियाला असे ज्या वर्णाचा हिरा त्या वर्णाच्या व्यक्तीला फलप्रद होतो. हा साधारण नियम. वरच्या जातीचा हिरा, खालच्या जातीला अधिक फलदायक, ब्राह्मणी हिरा सर्वत्र फलदायक असतो. रसवीर्यविपाकाने चार वर्णात व तीन प्रकारात पूर्व श्रेष्ठ. नपुंसकापेक्षा नारी, नारीपेक्षा नर तसेच शूद्रापेक्षा वैश्य, वैश्यापेक्षा क्षत्रिय असे गुणाने श्रेष्ठ हिरे असतात. **गुण**—आयुष्य देणारा, ताबडतोब उत्तम गुणदायक. शुक्रधातूला चांगला, पौष्टिक, सर्वदोषनाशक, सर्वरोगहारक, पाऱ्याला बांधणारा व मारणारा, अग्निदीपक मृत्युहारक. हिऱ्याबरोबर तिप्पट पारद खलून गोळी करून ती उपयोगात आणावी. ती तोंडात धरली तर हलणारे दात बळकट होतात. **शुद्धि**—कुळथाच्या काढ्यात किंवा कोद्रूच्या काढ्यात दोलायंत्राने उकळावा **मारण**—प्रथम चार वेळा हिराचूर्ण ढेकणाच्या रक्ताने भिजवावे. गेळफळाच्या रसामध्ये गांडूळ वाटून हिऱ्याला त्याचा लेप करून वीस वेळा वराहपुट किंवा गजपुट द्यावे. याने त्याचे भस्म होते. पुरुषी हिरा पुरुषाला. स्त्रीजातीचा स्त्रीला, नपुंसक जातीचा नपुंसकाला द्यावा हा नियम पाळला गेला नाही तर गुण येत नाही, ह्याला अपवाद फक्त पुरुषजातीचा हिरा. तो सर्वत्र द्यावा.
**धातु०** ( चवि. ७.७२ ) एक धातु.

वनस्पति० कोकिलाक्षः ( रापरि. ४.४९ )
तालीमखाना.
कुशः ( रा. ८.२०७ ) दर्भ प्रकार.
वालकम् ( ध. १.४७ ) वाळा.
स्नुही ( र. २०.१५९ ) त्रिधारी निवडुंग.
खनिज० वैक्रान्त ( ध. ६.४४ ) तोरमल्ली.
रत्न० विषापहः ( चचि. २३.२५२;
सुसू. ४६.३२९-३० ) एक रत्न. विषनाशक.
हीरकम् ( र. २.५५-५६; ध. ६.५५ ) हिरा.
चतुर्विधादभ्रकादन्यतमम् ( र. २.५ )
वज्राभ्रक. अभ्रकाच्या चार प्रकारांतील एक.

**( वज्री )**–स्त्री., वनस्पति० स्नुही ( र. २१.९२ )
त्रिधारी निवडुंग.
अस्थिसंहारिका ( र. २४.१०७ )
अस्थिनाशक त्रिधारी निवडुंग.

**–कण्टक**–पु., वनस्पति० स्नुक्; सेहुण्डः
( ध. १.२३५ ) त्रिधारी निवडुंग.
कोकिलाक्षः (रापरि. ४.४८ ) तालीमखाना.

**–कन्द**–पु., वन्यः सूरणः (र. २.१०५ )
सुरण, रान सुरण.

**–कन्दक**–पु., सूरणः, शूकरकन्दाख्यो वा
( र. २९.८९ ) सूरण किंवा डुक्करकंद.

**–कपाट**–पु., पारदयोग० ग्रहणीगदहरः
( र. १६.४८ ) पाऱ्याचा एक योग. ग्रहणीनाशक.

**–कारक**–न., भैषज्य० व्याघ्रनखम् ( ध. ३.६० )
वाघनख.

**–क्षार**–पु., भैषज्य० सामुद्रसैन्धवकाचयवक्षारसौव-
र्चलटंकणयुक्त, अयं सर्वोदरगुल्मशोफशूलानां
नाशकः ( र. १९.२६-३१ )
एक क्षार. मीठ, सैंधव, काचलोण, जवखार, पादे-
लोण, टाकणखारयुक्त, हा क्षार सर्व उदर, गुल्म
सूज, शूलनाशक.

**–तैल**–न., सर्वान्कुष्ठान्मर्दनान्नाशयेत्
( र, २०.१५५-५९ )
क्षारतेल. सर्व कुष्ठांना लावून चोळल्याने कुष्ठ नष्ट
करते.

**–द्रावणका**–स्त्री., मूषाविशेषः ( र. १०.१३-१४ )
एक प्रकारची मूस.

**–धर**–पु., पारदयोग० पारदगन्धकताम्राभ्रकभस्मादि-
युक्तः पक्तिशूलादिनाशनः ( र. १६.१०५ )
पारा, गंधक इत्यादीचा एक योग. पचन चालू
असताना होणारा शूल इत्यादी नाशक.

**–धार**–पु., पारदयोग० पारदवज्राभ्रकसुवर्णादियुक्तो-
ऽयं सर्व कुष्ठ नाशकः ( र. २०.१४० )
पाऱ्याचा योग. सर्वकुष्टनाशक.

**–पञ्जर**–पु., पारदयोग० व्याधिवार्धक्यमृत्युप्रभृतिहरः
( र. ३०.८४-८७ )
पाऱ्याचा एक योग. हिरा, अभ्रक, सुवर्ण इ० युक्त.
हा योग सर्व रोग, वृद्धावस्था व मृत्यू नाशक.

**–पात्र**–वज्रमयं पात्रं, रागखाण्डवसट्टकान् वज्रवैडूर्य-
विचित्रेषु पात्रेषु निदध्यात् ( असंसू. १०.३६ )
हिरेजडित पात्र. चटण्या, कोशिंबरी ठेवण्याकरिता
उपयुक्त. वैडूर्यमण्याचे पात्रही उपयुक्त.

**–पुष्पा**–स्त्री., वनस्पति० शतपुष्पा ( रा. ४.२ )
बडीशेप.

**–प्रोक्ता**–स्त्री., वनस्पति० सुधा ( इ. असं. ३.८ )
त्रिधारी निवडुंग.
वज्रकन्दः ( सुउ. ६०.४८ )
एक कंद. वज्रमुष्टिकंद, कडू सुरण, रानसुरण.

**–बीजक**–पु., वनस्पति० लताकरञ्जः ( रा. परि. ८.२४)
सागरगोटा.

**–मूली**–स्त्री., वनस्पति० माषपर्णी ( रा. ३.१७१ )
रानउडीद.

**–मूषा**–स्त्री., मूषाविशेषः ( र. १०.१० )
एक पक्की मूस.

**–रस**–पु., पारदयोग० क्षयनाशनः
(र. १४.६०-६९) पाऱ्याचा एक योग. क्षयनाशक.

**–लता**–स्त्री., अस्थिसंहारी ( र. २८.१३ )
एक वेल. पहा 'वज्रवल्ली'.

**–वल्ली**–स्त्री., वनस्पति० अस्थिसंहारी, त्रिचतुष्कोण-
काण्डा सूक्ष्मबहुपर्वका वृक्षोपर्युत्पद्यमाना ओषधिः
( र. ४.७४ )
एकवेल. त्रिधारी चौधारी कांड्याची लहान व
पुष्कळ पेरी असलेली झाडावर होणारी वेल.

**–वृक्ष**–पु., वनस्पति० स्नुक् ( रा. ८.३५६ )
त्रिधारी निवडुंग.

**–शल्य**–स्त्री., वनस्पति० कुटुम्बिनी (रा परि. ५.२१ )
पाण्यात होणारी दूध निघणारी वनस्पती.

**–शेखर**–पु., पारदयोग० क्षयकुष्ठहरोऽयं मासं यावत्
मात्रासेवितः ( र. २.७४ ) पाऱ्याचा एक योग.

**वज्रक**–न., खनिज० वैक्रान्तम् ( ध. ६.४४ )
तोरमल्ली.
**भैषज्य० लवणम्** ( रा. ६.५५ ) **गुणाः–उष्णं तीक्ष्णं रोचनं सरं गुल्मोदरविष्टम्भशूलहरं च** ( रा. ६.५५ )
एकप्रकारचे मीठ. गुण– उष्ण, तीक्ष्ण, सारक, रोचक, गुल्म–उदर–अवष्टंभ–शूलहारक.
**सिद्धसर्पि० इदं सर्पिः विसर्पज्वरकामलास्रकुष्ठापहम्** ( असंचि. २१ )
हे सिद्ध तूप. धावरे, ज्वर, कावीळ, रक्तपित्त व कुष्ठ नाशक.
**–क्षार**–खनिज० **वज्रकम्** (रा. ६.५५)
एक मीठ, क्षार.
**–तैल**–न., सिद्धतैल० **कुष्ठचिकित्सार्थम्** ( सुचि. ९.५४-५७ )
एक तयार केलेले तेल. कुष्ठनाशक.

**वज्राभिधाना गुटिका**–स्त्री., योग० **पाण्डुरोगहृद्रोगगलरोगगरोदरासृग्दरभगंदरगुल्मवर्ध्मशुक्रमूत्रदोषहरा** ( असंचि. १८ )
एक गुटिका. पांडुरोग, हृद्रोग, गळा, शुक्र, मूत्र, यांचे रोग; कृत्रिम विष, उदर, प्रदर, भगंदर, गुल्म, वृषणवृद्धि नाशक.

**वज्रास्थिशृङ्खली**–स्त्री., वनस्पति० **कोकिलाक्षः** ( रापरि. ४.४८ ) तालीमखाना.

**वज्रिणी**–स्त्री., वनस्पति० **वज्री** ( रा. २८.५८-५९ )
एक वनस्पती.

**वञ्चना**–स्त्री., **धूर्तता** ( र. ७.३५ )
धूर्तपणा. कपट, फसवणूक.

**वञ्जुल**–पु., वनस्पति० **वेतसः** ( ध. ५.११६, ( सुचि. ५.८; असंसू. १६.३५; अहृसू. १५.४१ )
जलवेतस.
**–द्रुम**–पु., वनस्पति० **अशोकः** (रा. १०.२७०) अशोक.

**वट**–पु., वनस्पति० ( ध. ५.७६ ) **गुणाः–कषायो मधुरः शीतो रूक्षः स्तम्भनः कफपित्तघ्नस्तृष्णाच्छर्दिमूर्च्छारक्तपित्तज्वरदाहमोहव्रणशोफहरः** ( ध. ५.७६ )
हिं.—वड.
**म.—वड.**
गु.—वड.
बं.—बट.
वड. **गुण**–तुरट, गोड, थंड, रूक्ष, स्तंभक, कफपित्तघ्न, तहान, ओकारी, मूर्च्छा, रक्तपित्त, ज्वर, दाह, विचार न करता येणे, व्रण व सूज हारक.
**निष्प्ररोहो वटः** (चचि. ३.२५८; असंसू. १५.३३ )
ज्याला पारंब्या नाहीत असा वड.
**न्यग्रोधः** ( र. २.२७-२८ )
**अस्य काष्ठं दन्तपवनार्थमुपदिष्टम्** ( अहृसू. २.२ )
वड. याचे लाकूड दंतधावनाकरिता सांगितले आहे.

**(वटी)**–स्त्री., वनस्पति० **नदीवटः** ( रा. ११.११६ )
नदीवड.
**गोलाकारा गुटिका** ( र. २.७४ )
गोल आकाराची वडी, गुटी.
**–त्वच्**–स्त्री., **वटत्वचा, कषायोऽस्य योनिरोगेषु सेचनार्थमुपयुज्यते** ( असंउ. ३९ )
वडाची साल. हिचा काढा योनिरोगात शिंपडण्याकरिता उपयुक्त.
**–पत्र**–पु., वनस्पति० **सितार्जकः** ( रा. १०.८५ )
पांढरा अजवला.
**कुठेरकः** ( ध. ४.५४; अहृसू. २४.१८ )
वडाचे पान, तुळस, अजवला.
**–पत्रा**–स्त्री., वनस्पति० **वृत्तमल्लिका** (रा. १०.२२७)
बटमोगरा.
**मल्लिका** ( रापरि. १०. २३ ) मोगरा.
**–पत्री**–स्त्री., **पाषाणभेदकः** (रा.५.२११) पाषाणभेद.
**–प्रवाल**–पु., **वटस्य कोमलपत्रम्** (सुचि. १७.३५-३६)
वडाचे कोवळे पान.
**–प्लव**–पु., वनस्पति० **प्लक्षः** ( ध. ५.८१ )
पिंपरी, नांदरूख.
**–बीज**–न., **वटस्य बीजम्** ( असंचि. ४ ) वडाचे बी.
**–शुङ्ग**–पु., **अविकसितनववटपल्लवः** ( चचि. ४.८६-८७ )
न फुललेले नवे वडाचे पान.
**पुंसवनद्रव्येष्वेकं द्रव्यम्** ( सुशा. २.३२ असंशा. १.६१ )
मुलगा व्हावा म्हणून करावयाच्या संस्काराचे वेळी उपयुक्त द्रव्य.
**वटाङ्कुरः** ( इन्दुः असंउ. ४२ ) वडाचा अंकुर.
**–सौगन्धिक**–पु., खनिज० **गन्धकः** (रा. १३.१६६; ध. ३.११४ ) **कटुः उष्णो लोहसंहारः सूतहननो रसायनस्त्वग्दोषकुष्ठविसर्पहरः** ( ध. ३,११४ )

गंधक–गुण–तिखट, उष्ण, लोह–धातु मारक, पारा मारक, त्वचेचे रोग कुष्ठ धावरे नाशक.

**–हन्–** पक्षि० प्रतुदवर्गीयोऽयम् ( चसू. २७.५१; असंसू.७.७२-७५) पक्षी एक. (भक्ष्य टोचून खाणारा.)

**वटक**–पु., वनस्पति० नदीवटः ( रा.११.११६ ) नदीवड.
**पिष्टकासमर्दककूष्माण्डकमूलकादिकृतः मुग्दादिकृतः वटकः** ( सुसू. ४६.२९५ )
वडा. पीठ कासविंदा कोहळा मुळा इत्यादी एकत्र करून केलेला, व मूग इत्यादींचा केलेला.
**मान० कोलः स च निष्कद्वयमितः** ( असंक. ८; र. ११.४ )
वजन, अर्धा तोळा.
**गुटिका, गुटी, मोदकः** ( र. ८.२ )
गोळी, वडी, वडा, मोदक.

**वटभ**–पु., कीट० सौम्यकीटः श्लेष्मप्रकोपणः ( असंउ. ४३ )
एक सौम्य किडा. कफाचा प्रकोप करणारा.

**वट्टलोह**–न., खनिज० वर्तलोहम् ( ध. ६.३३ )
मिश्रधातु.

**वट्टलोहक**–न., खनिज० वर्तलोहम् ( रा. १३.३४ )
मिश्रधातु.

**वडवा**–स्त्री., अश्वा ( चइ.१२.७५ ) घोडी.

**–मुख**–पु., वडवानलः ( असंशा. ५.५६ )
समुद्रातील अग्नि.

**–(मुखी)**–स्त्री., रेवतीग्रह० ( काकरेवतीक. ५६ )
**योग० श्लेष्मजव्याधिनाशिनी सर्वरोगहरा च** ( र. १६.१३८ )
एक रेवतीग्रह. कफजरोगनाशक. एक योग.

**वडवाग्नि**–पु., पारदयोग० पारदादिभस्मयुतोऽयं स्थौल्यं तुन्दं च नाशयति ( र. १८.१९३-९४ )
पाऱ्याच्या भस्माचा एक योग. स्थूलता, तुन्दिलपणा नाशक.
**वडवानलः, समुद्रोदरमधिष्ठितोऽग्निः** ( र. १६.१२५ ) समुद्राच्या उदरातील अग्नि.
**तीव्राग्निः** ( र. २७.७८ ) तीव्र अग्नि.

**वडवाग्निमल**–पु., भैषज्य० अग्निजारः ( रा. ६.१४ )
अंबर.

**वडवानल**–पु., बिड० पारदयोग० पारदादिभस्मयुतोऽयं धनुर्वातदण्डवातशृङ्खलाकम्पवातानां नाशकः ( र. २१.१४५-४८ )
पाऱ्याच्या भस्माचा योग. धनुर्वात, दण्डवात, साखळीवात, कंपवातनाशक.

**वडवानलगुटिका**–स्त्री., योग० हरितालमाक्षिकस्वर्णादियुक्तोऽयं शूलकृम्यग्निवैषम्यग्रहणीशोथपाण्डुगुल्मार्शोवातकफरोगहरः श्वासकासज्वराणां नाशकः ( र. १८.१६२-६५ )
हरताळ, सुवर्णमाक्षिक, सुवर्ण इत्यादि युक्त योग. शूळ, कृमि, अग्नीची विषमता, ग्रहणी, सूज, पांडु गुल्म, मूळव्याध, श्वास, खोकला, ज्वर, कफवात-रोग नाशक.

**वत्सक**–न., वनस्पति० कुटजः '**बृहत्फलः श्वेतपुष्पः स्निग्धपत्रः पुमान् भवेत् । श्यामा चारुणपुष्पा स्त्री फलवृन्तैस्तथाऽणुभिः** ( चक. ५.४; ध. २.१३ )
कुडा. दोन प्रकार–मोठे फळ, पांढरी फुले, स्निग्ध पाने, असलेला पुरुष व काळा, तांबुस फुलांचा, फळे देठ लहान असलेला स्त्री जातीचा.
**वनस्पति० वत्सकबीजभूतः इन्द्रयवः** ( रा. ९.२१ )
इंद्रजव. कुड्याचे बी.
**खनिज० पुष्पकासीसम्** ( ध. ३. १२५; अहसू.१०.२८) श्रेष्ठ हिराकस. (पुष्पकासीसनामक).

**–कल्प**–पु., अध्यायसंज्ञा० ( चक. ५.१ )
अध्यायाचे नाव; कुड्याचे अनेक कल्प यात आहेत.

**–फल**–न., वनस्पति० इन्द्रयवः कुष्ठे आलेपनार्थमुपयुक्तम् ( चचि. ७.१३२; असंउ. ४० )
इंद्रजव. कुष्ठात लेपाकरिता उपयुक्त.

**–बीज**–न., वनस्पति० इन्द्रयवः (ध. २.१५) इंद्रजव.

**वत्सकादिगण**–पु., द्रव्यगण० वत्सकमूर्वाभार्ङ्गीकटुकामरिचं घुणप्रिया च गण्डीरम्। एला पाठाऽजाजीकट्वङ्गफलाजमोदसिद्धार्थवचाः इत्येष वत्सकादिगणो हि वातार्शःप्रभृतिगदान् निहन्ति ( अहसू. १५.३३-३४ )
कुडा इत्यादींचा वर्ग—कुडा, मोरवेल, भारंमूळ, कुटकी, मिरे, अतिविष, त्रिधारी निवडुंग, वेलदोडा, पहाडमूळ, जिरे, अजमोदा, मोहरी, वेखंड. हा वत्सकादिगण वायु, कफ, मूळव्याध इ० रोग नाशक आहे.

**वत्सनाभ**–पु., विषविशेषः, तद्गुणाः–अतिमधुर ईषदुष्णः पित्तसंशोधनो, वातकफघ्नः, कण्ठरुजाकर्णरुजासंनिपातहरः ( ध. ७.१२८ ) कन्दविषम्, स्निग्धघनगुरुकर्मण्यगुणम् ( असंउ. ४८; सुक. २.५; र. १०.८५ )

हिं.—बचनाग.

**म.—बचनाग.**

गु.—वछनाग.

बं.—अमृतविष.

बचनाग. एक कंदविष. **गुण**—अतिगोड थोडा उष्ण, पित्तशोधक, वातकफनाशक, घशातील-कानातील वेदना, संनिपात नाशक. स्निग्ध, घट्ट, जड अशी कार्ये करण्यात कमी उपयुक्त.

**वत्सर**–पु., **संवत्सरम्** ( अहृसू. १९.१८ )
वर्ष; बारा महिने.

**वत्सादनी**–स्त्री., **वनस्पति० गुणाः–मधुरा, वृष्या, संतर्पणी, रुच्या, पित्तनुत्, दाहास्रदोषविषदोषविनाशिनी** ( रापरि. ३.३४; चसू. २७.१०६ )
गुळवेल. **गुण**—गोड, शुक्रधातु, व रुचि यांना हितकर, पौष्टिक, पित्त, दाह, रक्तदोष, विषदोषनाशक.
**गुडूची** ( सुसू. ३९.७ ) **गुणाः–उष्णा, तिक्ता, वातप्रशमनी** ( सुसू. ४६.२५४-५५; ध. १.१, र. १७.१३८-३९; असंसू. ७.१४९ )
गुळवेल. उष्ण, कडू, वातशामक.

**वदद्ग्धक**–न., **वनस्पति० कत्तृणम्** ( रा. ८.१०६ )
रोहिसगवत.

**वदन**–न., **मुखम्** ( सुशा. ५.१० ) तोंड.

**–जिह्मत्व**–न., **मुखवक्रता** ( चसि. ९.६ )
तोंडाचा वाकडेपणा.

**वदनोपचय**–पु., **मुखपुष्टिः** ( चसू. ५.७८ )
तोंडाची पुष्टि.

**वदान्य**–वि., **उदारः, दानशीलः**, ( र. ७.३४ )
उदार, दानशील.

**वद्रपञ्चमूल**–न., **महत् पञ्चमूलम् बृहत्पञ्चमूलम्** ( असंउ. ४ ) मोठे पंचमूळ.

**वध**–पु., **अद्रव्यभेषजेष्वेकोपायः । वधोऽत्र न साक्षान्मृत्युरपितु वधस्याभिनयो वधभयं वा** (चवि. ८.८७)
वध. अद्रव्य औषधामध्ये एक उपाय. वध करावयाचा नाही, फक्त वध करण्याचा आव आणावयाचा, वधाची भीति.
**उन्मादोपक्रमविशेषः** ( चनि. ७.८; अहृसू. ११.४५)
उन्मादाचा एक उपचार.

**वधू**–स्त्री., **वनस्पति० स्पृक्का** ( ध. ३.६२ )
पिंडिका.
**सठी** ( ध. १.६१ ) कचोरा.
**प्रियङ्गुः सारिवा वा** ( र. २१.१२९ )
गव्हला, अनंतमूळ.

**वध्र**–न., **अनुयन्त्र०** ( अहृसू. २५.४० )
एक अनुयंत्र ( उपयंत्र ).

**वन**–न., **भैषज्य० जलम्** ( रा. १४.३१७ ) पाणी.

**–कदली**–स्त्री., **वनस्पति० काष्ठकदली** (रा.११.११०)
रानकेळ.

**–कन्द**–पु., **वनस्पति० सितसूरणः** ( रापरि. ७.८ )
पांढरा सुरण, रानसुरण.
**धरणीकंदः** (रापरि.७.४२) दांड्यासारखा लांब कंद.

**–कोद्रव**–पु., **वनस्पति० कोद्रवः** ( ध. ६.८६ )
हरीक, कोद्रु.

**–खण्डा**–स्त्री., **वनस्पति० पद्मिनी** ( ध. ४. १५७ )
कमलिनी.

**–गोक्षीरज**–पु., **निर्यास० वंशलोचनाभेदः**,
एक प्रकारचे वंशलोचन, तवकीर.
**वनस्पति० पलाशगन्धा** ( रा. ६.८९ )
एक प्रकारचे वंशलोचन.

**–चन्द्रिका**–स्त्री., **वनस्पति० मल्लिका** (रा. १०.२२५)
मोगरी.

**–च्छाण**–न., **वन्योपलम्** ( र. ४.२४.२५-२६ )
रानशेणी.

**–ज**–पु., **वनस्पति० नागचम्पकः** ( रा. १०.२४२ )
नागचाफा.
**तुम्बुरुः** ( ध. २.४२ ) रानकोथिंबीर.
**सितसूरणः** ( रा. ७. परि. ८ ) पांढरा सूरण.
**वनबीजपूरकः** ( रा. ११.३३ ) रानमहाळुंग.

( **–जा** )–स्त्री., **वनस्पति० मिश्रेया** ( रा. ४.५ ) बडीशेप.
**मुद्गपर्णी** ( ध. १.१३८ ) रानमूग.
**गन्धपलाशः** ( रा. ६.८९ )
एक प्रकारचे वंशलोचन.
**कासघ्नी** ( ध. १.९८ ) डोरलीचा प्रकार.
**अश्वगन्धा** ( रा. ४.४०० ) आस्कंद.
**अरण्यकार्पासी** ( रापरि. ४.४७ ) रानकपासी.
**शेफालिका** ( ध. ४.८३ ) राननिर्गुंडी.

**–जमूर्धजा**–स्त्री., **भैषज्य० कर्कटशृङ्गी**
( ध. १.८६ ) काकडशिंगी.

**–तिक्तक**–न., **शाक० पथ्यसुन्दरम्; कफपित्तहरं तिक्तं शीतं कटुविपाकि च** ( चसू. २७.९५ )
एक वनस्पती. कडु, पचनानंतर तिखट, कफपित्तहारक.

वनस्पति० वत्सकः ( अहृसू. ६.७७ ) कुडा.

**–दमन**–पु., वनस्पति० दमः ( रा. १०.१२२ ) दवणा.

**–दीप**–पु., वनस्पति० चम्पकः ( रा. १०.२४० ) चाफा.

**–पुष्पा**–स्त्री., वनस्पति० शतपुष्पा ( रा. ४.३ ) बडीशेप.

**–पुष्पोत्सव**–पु., वनस्पति० आम्रः ( ध. ५.२ ) आंबा.

**–पूरक**–पु., वनस्पति० वनबीजपूरकः (रा. ११.३३) रानमहाळुंग.

**–प्रिय**–न., वनस्पति० त्वक् ( ध. २.५० ) दालचिनी.

**–बर्बर**–पु., वनस्पति० शालुकः (रा. १०.८६-१४५) काळा अजवला.

**–बर्बरिका**–स्त्री., वनस्पति० सुमुखः (रा. १०.८८-१४६) शेपु.

**–बीज**–पु., वनस्पति० वनबीजपूरकः (रा. ११.३३) रानमहाळुंग.

**–बीजपूरक**–पु., वनस्पति० मातुलुङ्ग० ( रा. ११.३३ ) रानमहाळुंग.

**–मल्लिका**–स्त्री., वनस्पति० ग्रैष्मी ( रा. १०.२३६ ) रानमोगरी.

**–मालिका**–स्त्री., वनस्पति० ग्रैष्मी ( ध. ५.१४० ) रानमोगरी.

**–मालिनी**–स्त्री., वनस्पति० वाराही ( ध. ४.९२ ) डुक्करकंद.
ग्रैष्मी ( ध. ५.१४० ) रानमोगरी.

**–मुद्ग**–पु., वनस्पति० मकुष्ठका ( ध. ६.९२ ) रानमूग, मटकी.
वैदलभेदः मुद्गिका ( सुसू. ४६.२७ ) द्विदलप्रकार. मूग.

**–( मुद्गा )**–स्त्री., वनस्पति० मुद्गपर्णी ( रा. ३.१७५ ) रानमूग.

**–मेथिका**–स्त्री., वनस्पति० मेथिकाविशेषः ( ध. ६.११३ ) मेथीचा प्रकार.

**–मोचा**–स्त्री., वनस्पति० काष्ठकदली (रा. ११.११०) रानकेळ.

**–रम्भा**–स्त्री., वनस्पति० गिरिकदली (रा. ११.११२) रानकेळ.

**–लक्ष्मी**–स्त्री., वनस्पति० कदली ( रा. ११.१०७ ) रानकेळ.

**–वल्लरी**–स्त्री., वनस्पति० निश्रेणिका ( रापरि. ८.५० ) रस नसणारी रानवेल.

**–वासक**–पु., वनस्पति० शाल्मलीकन्दः ( रापरि. ७.४६ ) सावरीचा कंद.

**–वासिन्**–पु., वनस्पति० शाल्मलीकन्दः ( रापरि. ७.४६ ) सावरीचा कंद.
शुभ्रालुः ( रा परि. ७.३३ ) पांढरा रताळू, रताळे.

**–वासी**–स्त्री., वनस्पति० ऋषभः [ रा. ५.१५८ ) अष्टवर्गापैकी एक. जीवनोपयुक्त.
वाराही ( रा. ७.१३५ ) डुक्करकंद.
मुष्ककः ( रा. ११.२२१ ) मोखा.

**–विलासिनी**–स्त्री., वनस्पति० शङ्खपुष्पी ( ध. ४.११३ ) शंखपुष्पी.

**–वृन्ताकी**–स्त्री., वनस्पति० बृहती ( रा. ४.१२१ ) रिंगणी, डोरली.

**–शालि**–स्त्री., वनस्पति० व्रीहिः ( रा. १६/९९ ) तांदळाचा एक प्रकार.

**–शृङ्गारक**–पु., वनस्पति० क्षुद्रगोक्षुरः ( रा. ३.१३२ ) लहान गोखरू.

**–सूरिका**–स्त्री., वनस्पति० कपिकच्छूः ( रा. ३.२०२) खाजकुहिली.

**–स्था**–स्त्री., वनस्पति० अश्वत्थी ( रा. ११.१२२ ) पिंपळ.
अत्यम्लपर्णी ( रा परि. ३.३९ ) वेलसुरण.

**–हरिद्रा**–स्त्री., वनस्पति० शोली ( रा. ७.१७ ) रानहळद.

**–हास**–पु., वनस्पति० कुन्दः ( रा. १०.२५६ ) कुंद.

**वनक**–पु., धान्य० वनकोद्रवः ( चसू. २६.८४ ) रानकोद्रु, रानहरीक.

**वनस्पती**–स्त्री., पुष्परहितो फलद्रुमः ( चक. १.८ ) फुले न येतां फळे असलेली वनस्पती.
वनस्पति० वटः ( ध. ५.७६ ) वड.
वटप्लक्षपिप्पलोदुम्बरादयो वनस्पतयस्तेषां कषायः पित्तजग्रन्थौ धावनार्थमुपयुज्यते ( सुचि. १८.११; असंसू. ८.६८ )
वड, पिंपरी, पिंपळ, उंबर इत्यादी वनस्पतींचा काढा पित्तज गाठीवर धुण्याकरिता उपयुक्त.

**–कषाय**–पु., **न्यग्रोधादिकषायः** ( सुचि. १२.४ )
वड इत्यादिकांचा काढा.

**–देवता**–स्त्री., **ये वनस्पतीन् हिंसन्ति परिगृहीता-नपरिगृहीतान् वा, तेषां वनस्पतिदेवता अभिक्रु-ध्यन्ति अग्निर्वैश्वानरो नाम, सोमः पितृमन्नाम, स्वधितिः शिवो नाम, आपो वरुणो नाम, भूमिर्नि-र्ऋतिर्नाम, गौर्वियन्नाम, गौः श्लोको नाम, देव पवमानो नाम, आदित्यः पूषा नाम, दिशः काष्ठा नाम, इन्द्रो वरुणो नाम, वायुः प्राणो नाम, ता वै द्वादश वनस्पनीनां देवताः। एता एव वनस्पतीन् घ्नन्तं कमपि घ्नन्ति ।**
( काक रेवतीकल्प. ६९ )
वनस्पति देवता. या बारा आहेत. अग्नि म्हणजे वैश्वानवर सोम म्हणजे पितृमत्, स्वधिति म्हणजे शिव, आप म्हणजे वरुण, भूमि म्हणजे निर्ऋति, गौ म्हणजे वियत्, गौः म्हणजे श्लोक, देव म्हणजे पवमान, आदित्य म्हणजे पूषा, दिक् म्हणजे काष्ठा, इंद्र म्हणजे वरुण, वायु म्हणजे प्राण, या नावाने या देवता आहेत. या देवता वनस्पतींना मारणाऱ्यांचा नाश करतात.

**–प्रसव**–पु., **उदुम्बरादिक्षीरवृक्षादीनां नूतनपल्लवः। गुणाः– कषायः शीतः संग्राही रक्तपित्तातिसारिणां शस्तः** ( सुसू. ४६.२४९ )
उंबर इत्यादी दुधाळ झाडांची नवी पाने. गुण– तुरट, थंड, मळ बांधणारे, रक्तपित्त, अतिसारावर उपयुक्त.

**–सिद्धघृत**–न., स्नेह० **क्षीरिवृक्षसिद्धघृतम्, कफजतिमिरे तर्पणार्थमुपयुज्यते** ( सुउ. १७.४२ )
उंबर इत्यादी दुधाळ झाडांच्या काढ्याने सिद्ध तूप. कफज दृष्टिरोगावर डोळा भरण्यास उपयुक्त.

**वनान्तपवन**–पु., **आम्रादिवाटिकासमीपवातः अस्य सुखस्पर्शेन मद्यपानजदाहस्योपशमो भवति**
( सुउ. ४७.५७ )
आंबराईजवळचा वारा. याच्या सुखस्पर्शाने मद्यपानापासून झालेला दाह शमतो.

**वनाम्र**–पु., वनस्पति० **क्षुद्राम्रः** ( रा. ११.६ )
रानआंबा.

**वनार्द्रका**–स्त्री., वनस्पति० **वनजार्द्रका. पेऊ** ( रा परि. ७.२१ ) रानआले.

**वनितास्तन्य**–न., **स्त्रीदुग्धम् मानुषदुग्धमामं सद् हितम्** ( असंसू. ६.६२ )
मानवी स्त्रीचे दूध. ते कच्चेच हितकारक.

**वनेज्य**–पु., वनस्पति० **राजाम्रः** ( रा. ११.११; पृ. १७० ) उंची आंबा.

**वनोद्भव**–पु., वनस्पति० **तिलाः** ( ध. ६.१२२ )
रानतीळ.

**(वनोद्भवा)**–स्त्री., वनस्पति० **मुद्गपर्णी** (रा. ३.१७५)
रानमूग.
**अरण्यकार्पासी** ( रापरि. ४.४७ ) रानकपाशी.
**वनबीजपूरकः** ( रा. ११.३३ ) रानमहाळुंग.

**वनौकस्**–पु., **मर्कटः** ( ध. परि. ८ ) माकड.

**वन्दका**–स्त्री., वनस्पति० **वृक्षादनी** ( ध. ४.९७ )
बांडगूळ.

**वन्दनीय**–पु., वनस्पति० **पीतो भृङ्गराजः** (रा. ४.२१)
पिवळा माका, पिवळा भांगरा.

**(वन्दनीया)**–स्त्री., भैषज्य० **गोरोचना** ( ध. ३.२० )
गोरोचन.

**वन्दाक**–पु.. वनस्पति० **वृक्षादिनी**
( इंदुः, असंउ. रा. ६.१४१ ) बांडगूळ.

**वन्ध्य**–वि., **अनपत्यकः ( पुमान् )** ( र. २२.३ )
संतती नसलेला पुरुष.

**(वन्ध्या)**–स्त्री., **निरपत्या स्त्री** (सुक. ६.११) **आदिवन्ध्या रक्तवन्ध्या वातवन्ध्या पित्तवन्ध्या श्लेष्मवन्ध्या संनिपातवन्ध्या भूतवन्ध्या देववन्ध्याऽभिचारवन्ध्या चेति नव वन्ध्याः** ( र. २२.३ )
वांझ स्त्री. प्रकार नऊ. ते वर आहेत. दैवयोगाने जन्मतः वंध्या १, वात–पित्त–कफ–रक्त व संनिपाताने असलेल्या ५ वंध्या, व भूत, देव व जारणमारणाने झालेल्या वंध्या ३ अशा नऊ वंध्या.
वनस्पति० **वन्ध्यकर्कोटकी** ( रा. ३.२७३, र. २०.५४-५५ ) वांझकर्टोली.

**–कर्कोटकी**–स्त्री., लता० **तिक्ता, कट्वी कफापहोष्णा, स्थावरादिविषनाशिनी रसायनी चेति** (र.१७.१६)
वांझ कर्टोली. **गुण**—कडु तिखट उष्ण कफ व स्थावर जंगम इत्यादी विषनाशक.
**त्रपुविशेषः** ( ध. १.१८५ ) एक प्रकारची कांकडी.

**कर्कोटी**–स्त्री., वनस्पति० **कर्कोटकी** ( रा. ७.२७६ )
वांझकर्टोली.

**वन्ध्यात्व**–न., स्त्री., रोग० **अशीतिवातरोगेष्वेकः अनपत्यता** ( कासू. २७.१९-२९ )
ऐशी वातविकारापैकी एक. वांझपणा.

**वन्य**–पु., वनस्पति० सितसूरणः ( रा. ७; परि. ८ ) पांढरा सुरण.
**महानलः** ( ध. ४.१४२ ) देवनळ.
**त्वक्** ( रा. ६.७६ ) दालचिनी.
**परिपेलम्** ( ध. ३.५५ ) नागरमोथा.
**गृष्टिः** ( रा. ७.१३५) डुक्करकंद.
**कैवर्तमुस्तकम्** ( चक्र. चसू. ३.८ ) लहान नागरमोथा.
**वनाकम्** ( चचि. ३.२५८; अहृसू. १५.६ ) भद्रमोथा.

**( वन्या )**–स्त्री., वनस्पति० राजखर्जूरी ( रा. ११.६८ ) पेंडखजूर.
**मुस्ता** ( रा. ६.५९ ) नागरमोथा.
**मिश्रेया** ( रा. ४.६ ) बाळंतशेप.
**गन्धपलाश** ( रा. ६.८९ ) एक कचोरा.
**चूडामणिः** ( रा. ३.४७ ) एक प्रकारची कावळी.
**मुद्गपर्णी** ( रा. ३.१७५ ) रानमूग.
**कुरण्टः** ( रा. १०.४१९ ) निळी कोन्हांटी.
**गोपालकर्कटी** ( रा. ३.२६४ ) लहान काकडी.

**–कुक्कुट**–पु., ताम्रचूडः वनजातः कुक्कुटः; गुणाः–स्निग्धः उष्णो वृष्यः स्वेदस्वरबलवहो बृंहणो गुरुर्मयूरतुल्यगुणश्च ( सुसू. ४६.६५-६६ )
रानकोंबडा. मांसाचे **गुण**—स्निग्ध, उष्ण, शुक्राला हितकर, पौष्टिक, घाम, स्वर, यांना बलकर. जड. मोराच्या मांसाच्या गुणांप्रमाणेच.

**–कुलत्थ**–पु., धान्य० गुणाः–आनाहमेदो–गुदकील–हिक्काश्वासापहः शोणितपित्तकृच्च, कफस्य हन्ता, नयनामयघ्नश्च ( सुसू. ४६.३८ )
रानकुळीथ. **गुण**—पोटफुगी, मेद, मूळव्याध, उचकी, श्वास, डोळ्याचे रोग नाशक. कफघ्न व रक्तपित्त करणारा.

**–जीर**–पु., वनस्पति० बृहत्पाली ( ध. २.७२ ) रानजिरे.

**–वृक्ष**–पु., वनस्पति० पिप्पलः ( ध. ५.८० )

**वन्यादिपिप्पली**–स्त्री., वनस्पति० चविका (रा. ६.१२२) गुणाः–उष्णा, तीक्ष्णा, रुच्या, दीपनी ( रा. ६.१२२ )
चवक उष्ण, तीक्ष्ण, रुचीला हितकर, अग्निदीपक, पिंपळ.

**वन्यारिष्टा**–स्त्री.; वनस्पति० शोळी ( रापरि. ७.१७ ) रानहळद.

**वपाटिका**–स्त्री., रोग० क्षुद्ररोग० अवपाटिका ( सुचि. २०.४२ ) एक किरकोळ रोग.

**वपावहन**–न., मेदःस्थानम् ( चशा. ७.१० ) वपोदरस्था स्निग्धवर्तिका, यां जनास्तैलवर्तिकेत्याहुः ( चवि. ५.८ )
मेदाचे स्थान. वपा–उदरातील तेल वात.

**वपुस्**–न., शरीरम् ( सुचि. २४.५३ ) शरीर.

**वमथु**–पु., लक्षण० छर्दिः ( सुउ. ५१.८; सुसू. ४६.५०४; अहृसू. २.४ ) एक लक्षण. ओकारी.

**वमन**-न., उपक्रम० यदूर्ध्वभागेन मुखेन दोषहरणं करोति ( चक. १.४ ) वमनं श्लेष्महराणां श्रेष्ठम् ( चसू. २५.४० ) प्रशस्तिः–श्लेष्मणि वमनं कुर्यात् संयोगे च कफाधिके । आमाशयगताऽन्नशल्यनिर्हरणार्थमुपयुज्यमाना चिकित्सा ( सुसू. २७.४ ) वमनार्हाः–" नवज्वरातिसाराधःपित्तासृग्राजयक्ष्मिणः । कुष्ठमेहापचीग्रन्थिश्लीपदोन्मादकासिनः । श्वासहृल्लासवीसर्पस्तन्यदोषोर्ध्वरोगिणः । अवाम्या–गर्भिणी, रूक्षः क्षुधितो नित्यदुःखितः बालवृद्धकृशस्थूलहृद्रोगिक्षतदुर्बलाः, प्रसक्तवमथुप्लीहतिमिरक्रिमिकोष्ठिनः । ऊर्ध्वप्रवृत्तवाय्वस्रदत्तबस्तिहतस्वराः । मूत्राघात्युदरी गुल्मी दुर्वमोऽत्यग्निरर्शसः ॥ उदावर्तभ्रमाष्ठीलापार्श्वरुग्वातरोगिणः । ऋते विषगराजीर्णविरुद्धाभ्यवहारतः । प्रसक्तवमथोः पूर्वे प्रायेणामज्वरोऽपि च, धूमान्तैः कर्मभिर्वर्ज्याः सर्वैरेव त्वजीर्णिनः ( अहृसू. १८.१-७ ) विधिः–अथातुरं स्निग्धं स्विन्नमभिष्यन्दिभिराहारैरनवबद्धदोषमवलोक्य श्वो वमनं पाययिताऽस्मीति संभोजयेत्तीक्ष्णाग्निं बलवन्तं बहुदोषं महाव्याधिपरीतं वमनसात्म्यं च । अथापरेद्युः पूर्वाह्णे साधारणे काले वमनद्रव्यकषायकल्कचूर्णस्नेहानामन्यतमस्य मात्रां पाययित्वा वामयेद्यथायोगं कोष्ठविशेषमवेक्ष्य, असात्म्यबीभत्सदुर्गन्धिदुर्दर्शनानि च वमनानि विदध्यात्, अतो विपरीतानि विरेचनानि, तत्र सुकुमारं कृशं बालं वृद्धं भीरुं वा वमनसाध्येषु विकारेषु क्षीरदधितक्रयवागूनामन्यतममाकण्ठं पाययेत्, पीतौषधं च पाणिभिरग्नितप्तैः प्रताप्यमानं मुहूर्तमुपेक्षेत, तस्य च स्वेदप्रादुर्भावेण शिथिलतामापन्नं स्वेभ्यः स्थानेभ्यः प्रचलितं कुक्षिमनुसृतं जानीयात्, ततः प्रवृत्तहृल्लासं ज्ञात्वा जानुमात्रासनोपविष्टमाप्तैर्ललाटे पृष्ठे पार्श्वयोः कण्ठे च पाणिभिः सुपरिगृहीतमङ्गुलीगन्धर्वहस्तोत्पलनालानामन्यत-

मेन कण्ठमभिस्पृशन्तं वामयेत्तावद्यावत् सम्यग्वान्तलिङ्गानीति। क्षीरादयो वमनद्रव्यसंस्कृता ज्ञेयाः अथवा क्षीरादीन् पूर्वं पाययेत्, अनन्तरं मात्रया वमनद्रव्यमिति। (सुचि. ३३.५-७) कफे तीक्ष्णोष्णकटुकैर्द्रव्यैर्वमेत्। पित्ते स्वादुशीतैर्द्रव्यैर्वमेत् स्निग्धाम्ललवणैर्वायुना युक्ते कफे वमेत्। (अहसू. १८.२१) मर्यादा–यावत् पित्तस्य दर्शनं स्यात्, कफस्य वा छेदोऽन्तः स्यात् तावद्वमेत्। हीनयोगे–नरः कणाधात्रीसिद्धार्थलवणोदकैरसकृद्वमेत्। सम्यग्योगे कफपित्तानिलाः क्रमेण निर्विबन्धं निःसङ्गं प्रवर्तन्ते। अतियोगे–पुनः फेनचन्द्रकरक्तवद्वमितं भवति। सम्यग्योगेन वमिते सति मुहूर्तमाश्वास्य धूमत्रयात् अन्यतममेकं पाययेद्वैद्यः, अनन्तरं स्नेहाचारमादिशेत्। ततः सायं प्रभाते बुभुक्षित उष्णोदकेन स्नातो रक्तशाल्यन्नं भुञ्जानः पेयादिकं क्रमं भजेत्, यथा प्रधानशुद्धया शुद्धो नरो द्वावन्नकालावेकस्मिन् दिने पेयां भजेत्। द्वितीयेऽह्न्येकमन्नकालं विलेपीम् आद्रियेत। तृतीये वासरे द्वावन्नकालौ विलेपीमेव। चतुर्थे दिवसे अकृतं शुण्ठीलवणाद्यसंस्कृतं यूषं, कृतं शुण्ठीलवणादिसंस्कृतं यूषं च द्वावन्नकालौ भजेत्, पञ्चमेऽह्नि प्रथमेऽन्नकाले च अमुमेव सेवेत। त्रिष्वपि कालेष्वकृतं कृतं च यूषं भजेत् विभज्य तावद् गम्यते। एवं कालत्रयं कृताकृतं रसं विभज्य भोजयेत्। सप्तरात्रेण प्रकृतिभोजनं क्रमेण सेवेत। तथैव मध्यशुद्धिशुद्धस्यावरशुद्धिशुद्धस्य च यथास्वं योजना कार्या। (अहसू. १८.२९) वमने आन्तिकी वैगिकी मानिकी लैङ्गिकी चेति चतुर्विधा शुद्धिरुच्यते। आन्तिकी शुद्धिः पित्तान्तत्वं वमनमिति मर्यादा। वैगिकी शुद्धिश्चतुर्भिर्वेगैर्जघन्यं वमनम्। यत्तु षड्भिस्तन्मध्यमम् यत्त्वष्टाभिस्तत् प्रवरम्। (चसि. १.१३-१४) मानिकी शुद्धिः विरेकादनन्तरं वमितदोषस्य प्रस्थमानमुक्तम्। लैङ्गिकी शुद्धिः सम्यग्वमनलक्षणं पित्तान्तत्वाद् बोध्यम् (चसि.१.१३) वमने मदनफलं श्रेष्ठम्, वमनावसरे तत्कषायं मृदितगालितं सूत्रोदितेन विधिना पिबेत्। तेन साधु बमेत् (अहक. १.१-८) 'मदनमधुकलम्बानिम्बबिम्बिविशालात्रपुसकुटजमूर्वादेवदालीकृमिघ्नम्। विदुलदहनचित्राः कोशवत्यौ करञ्जः कणलवणवचैलासर्षपाश्छर्दनानि।' इति मदनादिगणः प्रयुज्यते (अहसू. १५.१) मृदुकोष्ठेन क्षुद्वताऽल्पकफेन वा पीतमतितीक्ष्णं हिमं स्तोकं तथाऽजीर्णे दुर्बलेन वा पीतं वमनमधः प्रयाति। तेन इष्टहानिर्दोषप्रकोपाश्च भवन्ति। अस्यां व्यापादितं नरं स्निग्धं कृत्वा पूर्वमतिक्रमं स्मरन् वामयेत्। (अहक. ३.१-२) अतिवमतो वायुना यस्य हृदयं पीड्यते तस्मै स्निग्धाम्ललवणं दद्यात्। पित्ताधिक्ये मधुरशीतादिकं कफाधिक्ये रुक्षकटुतिक्तादिकं दद्यात्। तथाऽतिवमने रेचनं दद्यात्, शीताम्बुपरिषेचनं च कुर्यात्। फलरसैः सघृतक्षौद्रशर्करं मन्थं पिबेत् (अहक. ३.१-३०) वमनप्रक्रिया वमतोऽन्तःप्रविष्टजिह्वायां हृद्या यूषमांसरसाः स्निग्धाम्ललवणाः कवलग्रहा हिताः, किंच तस्य पुरतः अन्ये नरा अम्लानि फलानि भक्षयेयुः उष्ण-तीक्ष्ण-सूक्ष्म-व्यवायि-विकाशीन्यौषधानि स्ववीर्येण हृदयमुपेत्य धमनीरनुसृत्य स्थूलाणुस्रोतोभ्यः केवलं शरीरगतं दोषसङ्घातमाग्नेयत्वाद् विष्यन्दयन्ति, तैक्ष्ण्याद् विच्छिन्दन्ति, स विच्छिन्नः परिप्लवन् स्नेहभाविते काये स्नेहाक्तभाजनस्थमिव क्षौद्रमसज्जन्नणुप्रवणभावादामाशयमागम्योदानप्रणुन्नोऽग्निवाय्वात्मकत्वादूर्ध्वभागप्रभावाद्दोषधमूर्ध्वमुत्क्षिप्यते (चक. १.५) वमनप्रशस्तिः सम्यग्वमनेन के दोषाः न प्रादुर्भवन्ति ते यथा कास उपलेपःस्रोतःसु मलवृद्धिः स्वरभेदो निद्रा तन्द्राऽऽलस्यदौर्गन्ध्यं विषोपसर्गाः शीतलिकादयः कफप्रसेकः ग्रहणीरोगश्च न भवन्ति (सुचि. ३३.१२)

**वांती**—एक उपचार. जो वरच्या मार्गाने, (तोंडाने) दोष बाहेर घालवतो तो. कफहरण करणाऱ्या उपचारात वांती श्रेष्ठ. कफावर, किंवा कफाधिक इतर दोष असताना वांती करवावी. आमाशयगत अन्नरूपी शल्य बाहेर काढण्याकरता वांती करणे फार चांगले. **वांती करण्याला योग्यरोग**—नवज्वर, अतिसार, गुदद्वार व मूत्रद्वार यातून रक्त जाणे. क्षय, कुष्ठ, प्रमेह, अपची, (जीर्ण गंडमाला) गाठी, हत्तीपाय, उन्माद, खोकला, दमा, दोष उचंबळून येणे, धावरे, अंगावरच्या दुधातील दोष व मानेच्या वरील भागाच्या रोगात आणि मानेचे रोग. **वान्ती ज्यांना देता येत नाही असे**—गर्भवती स्त्री, रुक्ष शरीराचा, भूक लागलेला, नेहमी दुःखी असलेला, बालक, वृद्ध, कृश, स्थूल, हृद्रोगी, उरःक्षताने दुर्बल झालेला,

वान्तीने हैराण झालेला, प्लीहावृध्दी, दृष्टिरोग, पोटात कृमी असलेला, वरच्या मार्गाने वायु जाणे ( ढेकर ) व रक्त जाणे, ज्याला बस्ति दिलेला आहे, ज्याचा स्वर खोल गेलेला आहे, लघवी ज्याला कमी होते, उदरी, गुल्म झालेला, ज्याला वान्ती करवणे कठिण असते, ज्याचा अग्नि अतितीव्र आहे, मूळव्याध झालेला, वायु अडून ज्याचे पोट फुगते, श्रम, मूत्रमार्गातील ग्रंथी मोठी असलेला, फासळ्यात वेदना असलेला, वातरोगी ह्यांना वमन देऊ नये; तसेच विष, कृत्रिम विष, अजीर्ण विरुद्ध अन्न खाल्लेला ह्या कारणाखेरीज वरच्या रुग्णांना वमन देऊ नये, म्हणजेच त्या रुग्णांना विषादिकांची बाधा झाली असता वमन द्यावे. गर्भिणीपासून क्षतदुर्बलापर्यंत तसेच आमज्वरही ह्यांना वमनापासून धूमापर्यंतची सर्व कर्मे वर्ज्य आहेत आणि अजीर्णी मनुष्याला तर ही सर्व कर्मे वर्ज्य आहेत. **वान्तीचे औषध देण्याचा विधि**—रोग्याला स्नेहपान व अभ्यंगाने घाम काढवून स्निग्ध करून वमन देण्याच्या आदल्या दिवशी, उद्या वमन देणार आहे असे सांगावे. तीव्र अग्नि व बलवान असणाऱ्या व्यक्तीला दोषसंचय पुष्कळ असता, त्या मोठ्या व्याधीला योग्य वमन सोसवेल असे लक्षात घेऊन दोषांना शरिरापासून सुटे करून उचंबळवणारा आहार द्यावा व नंतर दोष ढिले झाले आहेत असे पाहून दुसऱ्या दिवशी सकाळी साधारण काल असताना वान्तीच्या द्रव्यांचा काढा, चटणी, चूर्ण, स्नेह यांपैकी योग्य ते योग्य प्रमाणात पाजून वमन करवावे. या वेळी कोठा कसा आहे हेही लक्षात घ्यावयाचे असते. वमनाच्या वेळी सात्म्य नसलेल्या चिळस येणाऱ्या, दुर्गन्धी, आणि दिसण्याला वाईट द्रव्यांचेही सहाय्य घ्यावे. रेचक देताना मात्र अशा वस्तूंचा संपर्क टाळून उलट सात्म्य, आनंददायक, सुगंधी आणि दिसण्यात सुंदर अशा द्रव्यांचे सहाय्य तेव्हा घ्यावे. सुकुमार, कृश, बालक, वृद्ध, भित्रा, ह्यांना ओकारीने, बऱ्या होणाऱ्या रोगात, दूध दही, ताक, पेज यापैकी काहीही रुचेल ते पोटभर पाजावे, नंतर औषध पाजून विस्तवावर हात ऊन करून त्याने पोट शेकीत असावे. सरासरी पाउण तास वाट पहावी. रोग्याला घाम येऊ लागला तर त्यावरून स्वतःच्या स्थानात दोष ढिले होऊन व तेथून निघून आमाशयात येत आहेत असे समजावे. नंतर उम्हासे येत आहेत हे पाहून गुडघ्या इतक्या उंच आसनावर बसवलेल्या त्या रोग्याचे कपाळ, पाठ, फासळ्या आणि घसा या ठिकाणी रोग्याला आप्तांनी हाताने चांगले व्यवस्थित धरून ठेवून अंगुळी, एरंडाच्या पानाची नळी किंवा कमळाची नळी या पैकी कशानेही रोग्याच्या घशाला स्पर्श करावा म्हणजे ओकारी होईल. योग्य वान्ती झाल्याची चिन्हे दिसेपर्यंत ओकाऱ्या होऊ द्याव्या. वामक द्रव्यांनी सिद्ध दूध इ० द्रव्ये वान्ती करता द्यावी किंवा दूध इ० द्रव्ये पाजून नंतर योग्य मात्रेने वान्तीचे औषध द्यावे.

**दोषानुरूप द्रव्ये—कफाधिक्य** असेल तर तीक्ष्ण उष्ण, तिखट द्रव्ये वान्तीसाठी द्यावीत. **पित्ताधिक्य** असेल तर गोड व थंड द्रव्ये द्यावीत. आणि वातयुक्त कफाधिक्य असेल तर स्निग्ध, खारट, आंबट द्रव्ये वान्तीसाठी द्यावीत. **वान्ती होऊ देण्याची मर्यादा**—वान्तीत कफ येणे बंद होईपर्यंत व पित्त दिसू लागेपर्यंत वान्ती होऊ द्यावी. वान्तीचे औषध नीट न लागू पडता **वान्ती बरोबर होत नसेल** तर पिंपळी, आवळकाठी, मोहरी ह्यांच्या सह मिठाचे पाणी प्यायला देऊन पुनः पुनः ओकारी करवावी. **वान्त्या योग्य प्रमाणात झाल्या** तर कफ पित्त आणि वात क्रमाने काहीही अडथळा न येता व मध्ये न थांबता तोंडातून बाहेर येतात. **अतिप्रमाणात वान्त्या झाल्या तर** फेस, रक्त व चमक्या ( चंद्रिका ) युक्त वान्ती होते. **योग्य प्रमाणात वान्त्या झाल्या असता** सरासरी पाऊण तास त्याला धीर देऊन तीन प्रकारच्या धूम्रपानांपैकी एखादे धूम्रपान त्यास करायला द्यावे, नंतर स्नेहनाच्या उपचारामध्ये जी वागणूक सांगितली आहे तिचे पालन करवावे नंतर सकाळी किंवा सायंकाळी चांगली भूक लागल्यावर ऊन पाण्याने स्नान करवून लाल साळीचा भात खाणाऱ्याला त्या भाताच्या पेया विलेपी इत्यादिकांचा क्रमाने आहार द्यावा. उत्कृष्ट शुध्दी झालेल्या रोग्याने दिवसाच्या दोन्ही जेवणाच्या वेळी पेयादिक घ्याव्या. दुसऱ्या दिवशी एका जेवणाच्या वेळी विलेपी घ्यावी. तिसऱ्या दिवशी दोन्ही जेवणाच्या वेळी

विलेपी घ्यावी. चौथ्या दिवशी सुंठ, मीठ इ० घातलेला यूष किंवा तो न घातलेला यूष दोन्ही जेवणाच्या वेळेला घ्यावा. पाचव्या दिवशी पहिल्या जेवणाच्या वेळी या प्रमाणे यूष घ्यावा. पुढच्या तीन अन्नाच्या वेळी शुण्ठ्यादि घालून किंवा न घालून असे दोन्ही प्रकारांनी कढणाचा आहार घ्यावा. असे सहा दिवस गेल्यानंतर सातव्या दिवशी नेहमीचे जेवण क्रमाने घ्यावे. मध्यम शुद्धी किंवा कमी प्रतीची शुद्धी झाली असेल तर त्या त्या प्रमाणे आहाराची योजना करावी. **शुद्धिप्रकार**–(१) **अन्तिकी**– शेवटी पित्त येईल ती अन्तिकी शुद्धी. **वैगिकी**– वान्तीचे चार वेग आले तर अल्प, सहा आले तर मध्यम, आठ आले तर उत्तम शुद्धि झाली असे समजावे. **मानिकी**– वान्तीचे औषध वांतीत नसलेली अशी वान्ती चौसष्ट तोळे झाली पाहिजे. **लैंगिकी** शुद्धी म्हणजे वेगांच्या शेवटी पित्त येईपर्यंत वांती झालेली असणे. वान्ती करविण्यात गेळफळ श्रेष्ठ आहे. त्याचा काढा कुस्करून व गाळून शास्त्रीय सूत्रात सांगितलेल्या विधीप्रमाणे द्यावा. त्याच्या योगाने सुखाने वान्ती होते. गेळफळ, ज्येष्ठमध, कडू भोपळा, बकाणानिम्ब, तोंडले, कडु इन्द्रावण, काकडी, कुडा, मोरवेल, देवडांगरी, वावडींग, जलवेतस, चित्रक, उंदीरकानी, कडु घोसाळे, कडु दोडके, करंज, पिंपळी, सैंधव, वेखंड, वेलची, सरसू. ही मदनादीगणातील द्रव्ये देखील वान्ती करविण्यासाठी उपयोगात आणली जातात. हलका कोठा असणाऱ्यांनी, भूक लागलेली असणाऱ्यांनी, कफ कमी असलेल्यांनी किंवा अजीर्ण झाले असताना अशक्त माणसाने घेतलेले अतिशय तीक्ष्ण, थंड थोडे किंवा प्रमाणात असे वान्तीचे औषध वान्ती न करता रेचक होते. त्यामुळे अपेक्षित फलाची प्राप्ती होत नाही. दोषांचा प्रकोप होतो. अशा वेळी वांतीचे अनिष्ट परिणाम झालेल्या अशा माणसाला स्निग्ध करून पूर्वीच्या चुका आठवून विधीप्रमाणेच वांतीच्या औषधाने वांती करवावी. अतिशय वांत्या झाल्यामुळे प्रकुपित झालेला वायु ज्याच्या हृदयाला पीडा देतो, अशा माणसाला स्निग्ध, आंबट, खारट, अशी द्रव्ये द्यावीत. अशा अवस्थेत पित्त अधिक झाले तर गोड, थंड इत्यादी द्रव्ये द्यावीत. कफ अधिक झाला तर रूक्ष, तिखट, कडु इत्यादी द्रव्ये द्यावीत. त्याच प्रमाणे वांत्या अतिशय होत असतील तर रेचक औषध द्यावे. थंड पाणी अंगावर शिंपडावे. फळाचे रस, तूप, मध, साखर घालून मंथ पाजावा. वांत्या होत असतानाच जीभ आत खेचली गेली तर त्या माणसास, आवडणाऱ्या अशा स्निग्ध, आंबट, खारट यूष व मांसरसाच्या गुळण्या देणे हितकर आहे. तसेच इतर माणसांनी त्याच्या पुढे चिंचेसारखी तोंडाला पाणी आणणारी आंबट फळे खावी.

**वमनकार्याची शरीरस्थ घटना**– उष्ण, तीक्ष्ण, सूक्ष्म प्रथम शरिरात पसरून नंतर पचणारी, सन्धिबंध ढिले करणारी औषधी द्रव्ये स्वतःच्या वीर्याने हृदयामध्ये जाऊन, धमनीमध्ये पसरून स्थूलसूक्ष्म स्रोतसांमधून, संपूर्ण शरिरात असलेल्या दोषसमूहास आग्नेय गुणामुळे पाझरवून, तीक्ष्ण गुणामुळे त्याचे सूक्ष्म, सूक्ष्म विभाग करतात तो सूक्ष्म, सूक्ष्म झालेला, स्नेहाने स्निग्ध झालेल्या शरिरात स्निग्ध भांड्यात मध जसे त्या भांड्याला चिकटून राहात नाही, त्या प्रमाणे, हा दोष, रसाबरोबर फिरणारा, त्याच्यात तरंगत आणि सूक्ष्मत्वामुळे आमाशयात येतो. वामक द्रव्य अग्नि-वायु घटित असल्यामुळे आणि वर जाण्याच्या स्वभावामुळे व उदानाचाही स्वभाव वर फेकणे हाच असल्यामुळे दोष वर फेकला जातो. **वांतीचे सुपरिणाम**– योग्य तऱ्हेची वांती झाल्याने, खोकला, तोंड लपेटलेले असणे, स्रोतसांमध्ये मलाची वाढ, स्वरफुटणे, झोप, तन्द्रा ( झापड ) आळस, दुर्गन्ध येणे, विषाचा उपसर्ग, गोवर, कांजिण्या इ० विकार, लाळ सुटणे आणि ग्रहणीरोग होत नाहीत.

**वनस्पति० शणः** (रापरि. ४.१०) सण.

**(वमनी)**–स्त्री., **वनस्पति० शणपुष्पी** ( ध. १.२००; असं. रक्तपित्त चि. ३) रानताग.

**–द्रव्य**–न., **वामकं द्रव्यम् फलजीमूतकेक्ष्वाकुधामार्गवकुटजकृतवेधनफलानि। फलजीमूतकेक्ष्वाकुधामार्गवपत्रपुष्पाणि** ( चवि. ८.१३५ ) **गुणाः– वमनद्रव्यं सरं सूक्ष्मं तीक्ष्णमुष्णं विकाशि च भवति। वमनद्रव्यं विरेचनगुणैः समं वर्तते। परं प्रभावात् वमनद्रव्यस्योर्ध्वगामित्वं वर्तते**

( सुचि. ३३.३३ )

वांतीचे द्रव्य. गेळफळ, देवडांगरी, कडु भोपळा, कडु गिलके, कुडा, कडु दोडके, यांची फळे, गेळफळ,

देवडांगरी, कडु दुध्या भोपळा, यांची पाने व फुले. गुण– सारक, सूक्ष्म, तीक्ष्ण, उष्ण. वामक द्रव्य रेचकाच्या गुणाचे असते परंतु प्रभावाने वरच्या मार्गाने तोंडातून ते बाहेर पडते.

**–द्रव्यविकल्पविज्ञानीय**–वि., अध्यायसंज्ञा० **वमनद्रव्यविकल्पविज्ञानमधिकृत्य कृतोऽध्यायः** ( सुसू. ४३.१ )
एका अध्यायाचे नाव. वांती करणाऱ्या द्रव्यांच्या निरनिराळ्या कल्पनांप्रमाणे योग्यता इ० बद्दल ज्ञान यात आहे.

**–मात्रा**–स्त्री.,**वमनद्रव्यकषायमात्राः– प्रधानमध्यमाऽधमभेदात्तन्त्रान्तरोक्ताः कथ्यन्ते। यदाह चक्षुष्यः– क्राथपाने नवप्रस्था ज्येष्ठा मात्रा प्रकीर्तिता । मध्यमा षण्मिता प्रोक्ता त्रिप्रस्था च कनीयसी** ( सुचि. ३३.७ )
वांतीच्या द्रव्यांची मात्रा– (प्रमाण) उत्कृष्ट, मध्यम, कनिष्ठ अशी तीन प्रकारची. चक्षुष्य नावाचा तंत्रकार म्हणतो मोठी मुख्य मात्रा ५७६ तोळे, मध्यम ३८४ तोळे व कनिष्ठ मात्रा १९२ तोळे समजावी.

**–विरेचनव्यापत्सिद्धि**–स्त्री., अध्यायसंज्ञा० ( चसि. ६.१ )
अध्यायाचे यात नाव. वामक व रेचके दिल्यानंतर होणाऱ्या अनिष्ट परिणामांचे उपाय आहेत.

**वमनोपग**–वि., **वमनोपयोगि** ( चसू. ४.८ )
वांती चांगली व्हावी म्हणून उपयुक्त द्रव्ये.

**वमनोपगगण**–पु., द्रव्यगण० **मधुमधुककोविदारककर्बुदारनीपविदुलबिम्बीशणपुष्पीसदापुष्पाप्रत्यक्पुष्पा इति दशेमानि वमनोपगानि भवन्ति** (चसू.४.४-१३)
वांतीला उपयुक्त होणाऱ्या द्रव्यांचा गण– मध, ज्येष्ठमध, कांचन, पांढरा कांचन, कळंब, वेतस, तोंडले, रानताग, रुई, आघाडा, ह्या दहांचा.
**महाकषायवर्गे एको गणः** ( चसू. ४.४-१३ )
महाकषायवर्गातील एक गण.

**वमनीपुष्प**–न., वनस्पति० **शणपुष्पी** ( असंचि. ३ )
रानतागाचे फूल.

**वमनीयधूम**–पु., **स्नायुचर्मखुरप्रभृतिभिः कृतो धूमः** ( ड. सुउ. ६४.८२ )
वामक धूर. स्नायु, कातडी, खुर, इत्यादींचा केलेला धूर.

**वमायिनी**–स्त्री., वनस्पति० **अङ्गारवल्ली** (रा. ९.१८२)
महाकरंज.

**वमि**–स्त्री., **वमनम्** ( र. १२.१० ) ओकारी.

**–निग्रहणवर्ग**–पु., द्रव्यगण० **लाजाम्रबदरदाडिमयवषष्टिकमातुलुङ्गसेव्यानि जाम्बवाम्रपल्लवानि वमिनिग्रहणानि मृत्स्ना च** ( असंसू. १५.२८ )
वांती थांबविणारा गण. लाह्या, आंबा, बोर, डाळिंब, जव, साठेतांदूळ, महाळुंग,. पिंपळ, जांभूळ, आंब्याची पाने.

**वयस्**–न., **शरीरावस्थाविशेषः, तारुण्यम् वयस्तश्चेति कालप्रमाणविशेषापेक्षिणी हि शरीरावस्था वयोऽभिधीयते। तद्वयो यथास्थूलभेदेन त्रिविधम्–बालं मध्यं, जीर्णमिति। तत्र बालमपरिपक्वधातुमजातव्यञ्जनं सुकुमारमक्लेशसहमसंपूर्णबलं श्लेष्मधातुप्रायमाषोडशवर्षं, विवर्धमानधातुगुणं पुनः प्रायेणानवस्थितसत्त्वमात्रिंशद्वर्षमुपदिष्टम् मध्यं पुनःसमत्वागतबलवीर्यपौरुषपराक्रमग्रहणधारणस्मरणवचनविज्ञानसर्वधातुगुणं बलस्थितमवस्थितसत्त्वमविशीर्यमाणः–धातुगुणं पित्तधातुप्रायमाषष्टिवर्षमुपदिष्टम्, अतः परं हीयमानधात्विन्द्रियबलवीर्यपौरुषपराक्रमग्रहणधारणस्मरणवचनविज्ञानं भ्रश्यमानधातुगुणं वायुधातुप्रायं क्रमेण जीर्णमुच्यते आवर्षशतम्। वर्षशतं खल्वायुषः प्रमाणमस्मिन् काले, सन्ति च पुनरधिकोनवर्षशतजीविनोऽपि मनुष्याः, तेषां विकृतिवर्ज्यैः प्रकृत्यादिबलविशेषैरायुषो लक्षणतश्च प्रमाणमुपलभ्य वयसस्त्रित्वं विभजेत्** ( चवि. ८.१२२ )
वय. शरिराची विशिष्ट अवस्था, तारुण्य कालाच्या प्रमाणाला अनुसरून शरिराची अवस्था, म्हणजे वय. प्रकार तीन–बाल, मध्य, जीर्ण. (१) **बाल**– प्रकार दोन. एक–अपरिपक्व धातु, स्त्रीत्व किंवा पुरुषत्वाची सर्व चिन्हे उत्पन्न न झालेली, सुकुमारत्व, क्लेश सहन करण्याची असमर्थता, बलही अपुरे, कफ धातूचे आधिक्य असलेली, सोळा वर्षांपर्यंतची अवस्था, दुसरी–धातुगुण वाढत आहेत. व मन ही अस्थिर असलेली तीस वर्षांपर्यंतची अवस्था. (२) **मध्यावस्था**–हीत बल, वीर्य, पौरुष, पराक्रम, ग्रहण, धारण, स्मरण, वचन, विज्ञान, इत्यादी सर्व धातुगुण यांची वयाला अनुरूप योग्य अशी वाढ व विकास सम प्रमाणात होतात. बल व मन हे व्यवस्थित असून धातूचे गुण घटत नाहीत. पित्त धातूचे आधिक्य असते. अशी साठ

वर्षापर्यंतची अवस्था. (३) **जीर्णावस्था**—यानंतर धातु, इंद्रिये, बल, वीर्य, पौरुष, पराक्रम, ग्रहण, धारण, स्मरण, वचन, विज्ञान ही व धातूंचे गुण क्षीण होऊ लागतात; व वायु धातु अधिक असणारी शंभर वर्षा पर्यंतची जीर्ण अवस्था या काळात. शंभर वर्षे आयुष्य आहे. पण त्यात कमी जास्त आयुष्याची माणसेही असतात. त्यांच्या विकृति खेरीज प्रकृति इत्यादी बल विशेषांनी व आयुष्याच्या लक्षणांनी त्याचे प्रमाण पाहून वयाचे तीन भाग पाडावेत.

**तत्रोनषोडशवर्षीया बालाः। ते त्रिविधाः– क्षीरपाः क्षीरान्नादा, अन्नादा इति। तेषु संवत्सरपराः क्षीरपाः, द्विसंवत्सरपराः क्षीरान्नादाः, परतोऽन्नादा इति। षोडशसप्तत्योरन्तरे मध्यं वयः। तस्य विकल्पो–वृद्धिर्यौवनं संपूर्णता परिहाणिरिति। तत्र आविंशतेर्वृद्धिः आत्रिंशतो यौवनम्, आचत्वारिंशतः सर्वधात्विन्द्रियबलवीर्यसंपूर्णता, अत ऊर्ध्वमीषत्परिहाणिर्यावत् सप्ततिरिति। सप्ततेरूर्ध्वं क्षीयमाणधात्विन्द्रियबलवीर्योत्साहमहन्यहनि वलीपलितखालित्यजुष्टं कासश्वासप्रभृतिभिरुपद्रवैरभिभूयमानं सर्वक्रियास्वसमर्थं जीर्णागारमिवाभिवृष्टमवसीदन्तं वृद्धमाचक्षते** ( सुसू. ३५.२९ )

**बाल्य**—सोळावे वर्ष लागेपर्यंत **बाल**. ३ प्रकार (१) दुधावर असणारे एक वर्षापर्यंतचे मूल, (२) दूध व अन्न घेणारे दोन वर्षाचे व (३) अन्न खाणारे दोन वर्षांच्या पुढच्या वयाचे. **मध्य**—सोळा ते ७० पर्यंत. (४) प्रकार–वृद्धि तारुण्य, संपूर्णता, व हानी. (१) वृद्धि–वयाच्या वीसापर्यंत. (२) तारुण्य– तीसापर्यंत. (३) संपूर्णता–चाळीस वर्षापर्यंत सर्व धातु इंद्रिये, बल वीर्य यांची संपूर्ण वाढ व विकास. (४) हानी–सत्तरापर्यंत थोडी हानी. **वृद्धत्व**—सत्तरा नंतर दररोज धातु, इंद्रिये, बल, वीर्य, उत्साह ही क्षीण होत जातात त्यामुळे वळ्या, केस पिकणे, टक्कल, खोकला, श्वास, इत्यादींचा उपद्रव होऊन त्यांनी त्रस्त होणारा सर्व क्रियांमध्ये असमर्थ व जीर्ण घर ज्या प्रमाणे वृष्टि होताच खचते त्याप्रमाणे क्षीण होत जाणाऱ्याला वृद्ध म्हणतात.

**पक्षी** ( असंसू.८.२३ ) पक्षी.

( **वयः** )-**परिणाम**–पु., **वयसः परिणतिः पक्वता वा** ( सुसू. १४.१८ ) वयाची पक्वता. वाढ.

–**परीक्षा**–स्त्री., **वयः कालेन कालविशेषेण परीक्षेत** ( चवि. ४.८ )
वय, काळ ( वर्षे, दिवस ) मोजून व तदनुरूप शरीर स्वरूप पाहून परीक्षावे.

–**सात्म्य**–न., **वयसः सात्म्यम्** ( चचि. १.२८ )
वयाला अनुसरून आत्मसात् होणारे पदार्थ.

–**स्तम्भन**–वि., **अवस्थाविशेषस्थापकम्** (र. ५.१४५)
तारुण्य कायम ठेवणारे.

–**स्थ**–वि., **तरुणः** ( ड., सुउ. २४.२४; अहृसू. ६.६८ )
तरुण.

(–**स्था**)–स्त्री., **वनस्पति० गुडूची** ( सुउ.३६.६) गुळवेल.
**ब्राह्मी** ( चवि. ८.१५१; असंसू. १५.४७ रा परि. ५.४१ ) ब्राह्मी.
**काकोली** ( ध. १.१३२ )
कावळी, अष्टवर्गापैकी एक वनस्पती.
**क्षीरकाकोली** ( ध. १.१३४ )
कावळीचा एक प्रकार. अष्टवर्गापैकी एक वनस्पती.
**आमलकम्** ( ध. १.२१५ ) आवळा.
**हरीतकी** ( ध. १.२०५; र. २२.९६; सुउ. ३२.४ )
हिरडा.

–**स्थापन**–वि., **वयः तारुण्यं स्थापयति इति यौवकरनम्** ( चसू. ४.८ )
तारुण्य स्थापना करणारे, तारुण्यकर.

–**स्थापनगण**–वि., **द्रव्यगण० पञ्चके महाकषायवर्गे एको गणः, वयस्तरुणं स्थापयतीति** ( चसू. ४.८ )
पांच महाकषायवर्गातील एक गण. तारुण्यस्थापक तारुण्यकर.
**अमृताऽभया धात्रीमुक्ताश्वेताजीवन्त्यतिरसामण्डूकपर्णीस्थिरापुनर्नवा इति दशेमानि वयःस्थापनानि भवन्ति** ( चसू. ४.१८ )
गुळवेल, हिरडा, आवळा, रास्ना, दूर्वा, दोडी, ज्येष्ठमध, मंजिष्ठा, सालवण, पुनर्नवा. ही वयस्थापक अशी दहा द्रव्ये आहेत.
**वर्षशतमायुःस्थापनम्** ( सुसू. १.८(७) )
शंभरवर्षे आयुष्य लाभण्याचा उपचार.
**घृतगुणेष्वेकः, यावदेवायुः प्रमितं तावदेवायुः स्थापयत्यनाबाधम्** ( सुसू. ४५.९६ )
तुपाच्या गुणांपैकी एक. जितके आयुष्य ठरलेले आहे. तितकेच आयुष्य मध्ये रोग इत्यादी बाधा न येता कायम ठेवते.

कुङ्कुमम् ( ध. ३.१२ ) केशर.

**वर**–न., वनस्पति० त्वक् ( रा. ६.७७ ) दालचिनी.
खनिज० सैन्धवम् ( अहसू. १०.२७ ) सैंधव.
आर्द्रकम् ( ध. २.८४ ) आले.

**(वरा)**–स्त्री., वनस्पति० काकमाची (रा. ४.३६) कावळी.
त्रिफला (र.१२.५१-५२;र.२.८६ अहसू.१५.३२) त्रिफळा.
गुडूची ( रा. ३.१ ) गुळवेल.
मेदा ( रा. ५.१६१ ) अष्टवर्गापैकी एक वनस्पती.
ब्राह्मी ( रा. ५.१४९ ) ब्राम्ही.
पाठा ( ध. १.७० ) पहाडमूळ.
हरिद्रा ( रा. ६.७९ ) हळद.
विडङ्गम् ( रा. ६.१६ ) वावडिंग.
वन्ध्यकर्कोटकी ( रा. ३.२७४ ) वांझकर्टोली.
शतावरी ( चचि. १९.६२ ) शतावरी.
आसुत० सुरा ( ध. ६.२५५ ) दारूचा एक प्रकार.

**(वरी)**–स्त्री., वनस्पति० शतावरी ( सुउ.१७.३४; अहसू. २०.३७; र. २०.७१ ) शतावरी.

**–करण्डक**–पु., करण्डकः ( र. १७.८१ ) कवठ.

**–तरु**–पु., वनस्पति० भल्लातकः ( रा. ११.२०२ ) बिबा, भिलावा.

**–तिक्त**–पु., वनस्पति० कुटजः ( रा. ९.१९ ) कुडा.
निम्बः ( रा. ९.४४ ) निंब.
पर्पटः ( ध. १.४५ ) पित्तपापडा.

**–( तिक्ता )**–स्त्री., वनस्पति० पाठा (ध. १.७० ) पहाडमूळ.

**–तिल**–पु., तिलभेदः, कृष्णतिलः ( र. ३०.४८-४९ ) द्र० 'तिल' काळे तीळ.

**–त्वच**–पु., वनस्पति० किराततिक्तः ( ध. १.३४ ) काडे चिराईत.

**–दा**–स्त्री., वनस्पति० सुवर्चला ( ध. ४.९८ ) ब्राह्मीचा एक प्रकार.

**–दारु**–स्त्री., न., स्थावरविष०पत्रविषम् ( असंउ. ४०; सुक. २.५) विषारी पान.

**–नाग**–न., अग्नौ ध्मानेन बहुशो दृढं मृदु कृष्णं द्रुतद्रावं च जातं नीलाञ्जनोपेतं तीक्ष्णलोहम् ( र. ८.३९ )
पोलाद निळा सुरमा घालून अग्नीत अनेक वेळा तापवून जेव्हा ते मृदु काळे व अग्नीवर पातळ रसमय होते, तेव्हा त्याला वरनाग म्हणतात.

**–पोत**–पु., पशु० जाङ्गलमृगः ( चसू. २७.४६ ) एक निर्जल प्रदेशातील पशु.

**–मूषा**–स्त्री., मूषा० इयं प्रहरावधिमग्निं सहते ( र. १०.१६ )
बळकट मूस. ही एक प्रहर अग्नि सहन करते.

**–लोहक**–न., सगन्धलकुचद्रवे बहुवारं निक्षिप्य पुनः पुनर्निष्कासितं तीक्ष्णलोहयुक्तं द्रुतं ताम्रम् ( र. ८.१२ )
पोलाद युक्त तांबे पातळ करून गंधक व लिंबूचा रस यात अनेक वेळा टाकला तर वरलोहक होते.

**–वर्णिनी**–स्त्री., वनस्पति० हरिद्रा ( ध. १. ५४ ) हळद.

**–वर्णी**–स्त्री., वनस्पति० हरिद्रा ( र. ११.१०४ ) हळद.

**–वार्तिक**–पु., रसशास्त्रतत्वज्ञः, वृत्तिष्टीका, तां जानाति इति वार्तिकः, वरः श्रेष्ठश्चासौ वार्तिकः, वरवार्तिकः ( र. ८.७२ )
पाऱ्याचे शास्त्रांतील एक तत्वज्ञ. श्रेष्ठ टीकाज्ञ.

**वराङ्ग**–पु., वनस्पति० अम्लवेतसः ( का सिद्धि ४ ) अम्लवेतस.
न., वनस्पति० गुडत्वक् ( चक. चचि. १२.१९ ( ३ ) दालचिनी.
त्वक् ( ध. २.५०; अहसू. २१.१४ ) दालचिनी.
वनवासिका त्वक् ( ड. सुक.६.३ ) दालचिनी.

**( वराङ्गी )**–स्त्री., वनस्पति० हरिद्रा (रा. ६.७९) हळद.
दन्तीभेदः, अरणी ( ध. १.२२५ ) द्र० ' दन्ती ' दातीचा एक प्रकार.

**वराङ्घ्रि**–स्त्री., त्रिकालमूलम् ( र. ३०.६९ ) रेणुकामूळ, निर्गुंडीमूळ, वाटाण्याचे मूळ.

**वराम्ल**–पु., वनस्पति० मातुलुङ्गः (ध. ५.२३) महाळुंग.

**वरारुह**–पु., वनस्पति० बिल्वः ( ध. १.१०७ ) बेल.

**वरासव**–पु., आसुत० त्रिवृत् तिल्वको हरीतकी एरण्डः कारवेल्लिका, सुधापयः इत्येवमादिप्रधानविरेचनद्रव्यकृतोऽयम् आसवो वरासवः सेहुण्डवर्जितः ( सुसू. ४४.३० )
तेड, रोध्र, हिरडा, एरंड, कारले, त्रिधारी निवडुंगाचे दूध या मुख्य विरेचनद्रव्यांपैकी शेवटचे गाळून केलेले आसव.

**वरक**–पु., धान्य० षष्टिकभेदः, ततोऽल्पान्तरगुणो वा ( चसू. २७.१४ )

साठे तांदुळाचा प्रकार. कमी गुणाचा.

**वनस्पति० कृष्णमुद्गः** ( ध. ६.८३ ) काळे मूग.

**प्रियङ्गुः** ( रा. १६.१४४ ) गव्हला.

**विष्किरपक्षिविशेषः** ( असंसू. ७.७१ )
उकरून भक्ष्य घेणारा एक पक्षी.

**श्यामबीजम्** ( चसू. २७.१८; सुसू. ४६.२१ )
काळा मूग.

**वरट**–पु., **पक्षि० हंससदृशः** ( अहृसू. ६.४६ )
हंसासारखा पक्षी.

( **वरटी** )–स्त्री., **कीट० शूकतुण्डविषः अग्निप्रकृतिकः पित्तरोगकृच्च** ( सुक. ३.५; सुक. ८.८-१२ )
गांधीलमाशी. अग्निप्रकृतीचा, पित्तविकारकारी किडा. तोंडातील सोंडेत विष असते.

**वरटी**–स्त्री., ( सुक. ३.५ ) गांधीलमाशी.

**–पत्र**–पु., **कीट० आग्नेयः** ( असंउ. ४३ )
एक उष्णप्रकृतीचा किडा.

**–मत्स्य**–पु., **मत्स्यः अयमस्थिविषः** ( सुक. ३.५ )
एक मासा. ह्याच्या हाडात विष असते.

**वरण**–न., **आवरणम्** ( चचि. २३. ४७; असंसू. २६.६)
आवरण.

**वरुणवृक्षः** ( असं. राजयक्ष्मचि. ७; र. २९.१२३)
वायवरणा.

**–बन्ध**–पु., **प्रजारक्षणबन्धः** ( कारेवती क. ८० )
रक्षण– बंधन करणारा बंध, राखी. ग्रहबाधेपासून बालकाचे रक्षण करण्यासाठी बांधावयाचे बंधन.

**वरणादिगण**–पु., **द्रव्यगण० ' वरणसैर्यकयुग्मशतावरी–दहनमोरटबिल्वविषाणिकाः । ' द्विबृहतीद्विकरञ्ज-जयाद्वयं बहलपल्लवदर्भरुजाकराः**
( असंसू. १६.१५-१६ )
वायवर्णा इत्यादींचा गण– वायवर्णा, दोन्ही कोऱ्हांटी ( पिवळी, तांबडी ) शतावरी, चित्रक, दुधीमोरवेल, बेल, मेढशिंगी, रिंगणी, डोरली, दोन्ही करंज, हिरडा अरणी, शेवगा, दर्भ व शिंदी.

**वराट**–पु., **भैषज्य० कपर्दिका** ( ध. ३ परि. २४ ) कवडी.

**वराटिका**–स्त्री., **भैषज्य० कपर्दिका** ( ध. ३ परि. २४ )
कवडी.

**कपर्दी** ( र. ३.१४५-४६ ) कवडी.

**वराह**–पु., **पशु० सूकरः, तन्मांसं स्नेहनं बृंहणं वृष्यं श्रमघ्नमनिलनाशनं बल्यं रोचनं गुरु स्वेदनं च**
( चसू. २७.७८-७९; अहृसू. १४.३४ )
डुक्कर. मांस– स्निग्ध करणारे, पौष्टिक, शुक्राला हितकर, श्रमनाशक, वातघ्न, बलकर, रुचकर, जड, व घाम आणणारे.

**कुरुक्षेत्राद् दक्षिणदिग्वर्ती देशविशेषः**
( कासंखिल. २५.१४ )
कुरुक्षेत्राच्या दक्षिणेकडे असलेला एक देश.

न., **खनिज० हीरकम्** ( ध. ६.५५ ) हिरा.

( **वराह** )–स्त्री., **वनस्पति० मुस्ता** ( ध. १.४० )
नागरमोथा.

(**वाराही**)–स्त्री., ( रा. ७.१३४ ) डुक्करकंद.

**–कन्द**–पु., **कन्दशाकविशेषः, बकालुकः, गुणाः– श्लेष्मघ्नो रसपाकतः कटुको मेहकुष्ठकृमिहरो बल्यो वृष्यो रसायनश्च** ( सुसू. ४६.३०९ )
डुक्करकंद–भाजी. गुण–कफनाशक, तिखट. पचल्यानंतर तिखट, बल, शुक्र यांना हितकर, विशुद्ध रसादी धातु करणारा, प्रमेह, कुष्ठ कृमिहारक.

**वनस्पति० गृष्टिः** ( रा. ७.१३६ )
गृष्टिकंद, डुक्करकंद.

**–कर्णी**–स्त्री., **वनस्पति० अश्वगन्धा** ( रा. ४.४०० )
आस्कंद.

**–दन्त**–पु., **वराहस्य दन्तः** ( चचि. ७.१६० )
डुकराचा दात.

**–दशन**–पु., **सूकरदन्तः, क्षतशुक्रकाख्यनेत्ररोग-हरवर्त्युपयोगिद्रव्यम्** ( असंउ. १४ )
डुकराचा दात. बुबुळाची जखम. या डोळ्याच्या रोगात याची कांडी–वात करून घासून अंजनाकरिता वापरतात.

**–पत्री**–स्त्री., **वनस्पति० अश्वगन्धा** ( रा. ४.४०२ )
आस्कंद.

**–मांसप्राया**–वि., **वराहमांसस्य नित्यसेवनं कुर्वाणा ( गर्भिणी )** ( चशा. ८.२१ )
डुकराचे मांस. नेहमी सेवन करणारी. ( गर्भिणी )

**–मेदस्**–न., **शूकरमेदः इदं नेत्ररोगेषु नस्य–शिरोबस्त्यादिभेषजेषूपयुज्यते** (असंउ.१९;सुचि.२६.१७)
डुक्कराची चरबी. डोळ्याच्या रोगात नाकात घालण्यास, डोक्याचा बस्ति इत्यादी उपचारात उपयुक्त.

**–वसा**–स्त्री., **इयं आनूपमृगवसानां श्रेष्ठतमा**
( चसू. २५.३८; अहृसू. ७.४२ )

डुकराच्या मांसाचा स्नेह. पाणी भरपूर असलेल्या प्रदेशातील प्राण्यांच्या मांसाच्या स्नेहामध्ये अत्युत्तम.

**-विष्ठा**-स्त्री., **सूकरशकृत् सुदग्धा च मषीरूपा सर्वनाडीविनाशिनी** ( असंउ. ३५ )
डुकराची विष्ठा. चांगली जाळून केलेली मशेरी सर्वनाडीव्रणनाशक.

**वराहिका**-स्त्री., वनस्पति० **कपिकच्छूः** ( रा. ३.२०२ )
खाजकुहिली.
**अश्वगन्धा** ( रा. ४.४०० ) आस्कंद.

**वरी**-स्त्री., ( ध. १.२९१ ) शतावरी.

**-मूल**-न., **शतावरीमूलम्** ( सुचि. १५.४५ )
शतावरीची मुळी.

**वरीयसी**-स्त्री., वनस्पति० **शतावरी** ( रा. ४.४४० )
शतावरी.

**वरु**-स्त्री., धान्य० ( असंसू. ६०.१५ ) एक तृणधान्य.

**वरुक**-पु., वनस्पति० **शणबीजम् श्यामाकदृसशः कषायमधुरलघुवातलशोषणादिगुणः** ( चसू. २७.१८ )
सणाचे, तागाचे बी. वऱ्याच्या तांदळासारखे तुरट, गोड, हलके, वातुळ, शोषक इत्यादी गुण कारक.

**वरुण**-पु., वनस्पति० **गुणाः-तिक्तः कटुः शीतः स्निग्धो वातघ्नो विद्रधिजन्तुरक्तदोषशीतवातहरश्च**
( ध. ५.११९ )
हिं.—वरना.
**म.—वायवरणा.**
गु.—बायवरणो.
बं.—वरुणगाछ.
वायवरणा. कडु, तिखट, थंड, स्निग्ध, वातघ्न, गळू, जंतु रक्तदोष, थंडवात नाशक.
**वनस्पति० तमालः** ( अरु. अहृसू. १५.२१; र. १६.१०५ ) तमाल.
**न., वनस्पति० जीरकम्** ( ध. २.६६ ) जिरे.
**देवता०** ( सुसू. ५.२६-२७ )
एक देवता. जलदेवता वरुण.
**तिक्तशाकद्रुमः** ( सुसू. ३९.७ ) एक कडु भाजी.

( **वरुणा** )-स्त्री., वनस्पति० **वरुणः** ( र. १८.२ )
वायवर्णा.

**-शाक**-न., शाक० **वरुणपत्राणां शाकत्वेनोपयोगः**
( सुसू. ४६.२७१ )
वायवर्ण्याच्या पानांचा भाजी म्हणून उपयोग होतो.
**वनस्पति० वरुणः, तस्य पत्राणि शाकत्वेनोपयुज्यन्ते**
( सुसू. ४६.२७१ )
वायवर्णाच्या पानांची भाजी होते.

**वरुणाम्ल**-न., वनस्पति० **वरुणः** ( र. २०.१६७ )
वायवरणा.

**वरुणात्मजा**-स्त्री., **आसुत० सुरा** ( ध. ६.२५५ )
वायवरण्याची दारु.

**वरुणादिगण**-पु., द्रव्यगण० **वरुणादिभेषजद्रव्यसमूहः, वरुणार्तगलशिग्रुमधुशिग्रुतर्कारीमेषशृङ्गीपूतीकनक्तमालमोरटाग्निमन्थसैरेयकद्वयबिम्बीवसुकवसिरचित्रकशतावरीबिल्वाजशृङ्गीदर्भा बृहती चेति**
( सुसू. ३८.१०-११ )
वायवर्णा इत्यादिकांचा वर्ग. वायवरणा, अर्जुनसादडा, शेवगा, गोडशेवगा, अरणी, काकड शिंगी, दोन्ही करंज, दुधी, मोरवेल, टाकळी, दोन्ही तांबडी निळी कोन्हांटी, तोंडली, आघाडा, चित्रक, शतावरी, बेल, मेढशिंगी, दर्भ, रिंगणी, डोरली.

**वरुणालय**-वि., **सामुद्रम् ( जलम् ) समुद्रो वरुणालयः, वरुणालयोद्भवमेव वरुणालयम्** ( चसू. २७.२१६ )
समुद्राचे पाणी.

**वरेण्य**-न., वनस्पति० **कुङ्कुमम्** ( रा.१२.२१ ) केशर.

**वरोहशाखिन्**-पु., वनस्पति० **प्लक्षः** ( रा. ११.१२४ )
पिंपरी, नांदरुख.

**वर्चस्**-न., **पुरीषम्** ( चशा. ७.१६; सुशा. ६.२५; अहृसू. ६.४; र. ३.१२४ )
विष्ठा, मळ.

( **वर्चः** )-**कीट**-पु., **सविषकीटः अयमग्निप्रकृतिकः पित्तजरोगकृच्च** ( सुक. ८.८-१२ )
विषारी किडा, पित्तकृतीचा, पित्तविकारकर.

**-क्षय**-पु., **वर्चसः पुरीषस्य क्षयः** ( चचि. १९.४१ )
विष्ठेचा क्षय, मलक्षय.

**-संग**-पु., **वर्चसो ग्रहः** ( चचि. १३.४१ )
विष्ठा साचणे, विष्ठेचा अवष्टंभ.

**-सांग्राहिक**-वि., **वर्चसः संग्रहकारकः**
( चसि. ६.५० )
विष्ठेचा संग्रह करणार. मलावष्टंभक.

**-स्थान**-न., **पुरीषोत्सर्गार्थं कृतः स्थानविशेषः**
( चसू. १५.६ )
शौचकूप, विष्ठेचे विसर्जन करण्याचे स्थान.

( **वर्चो** )-**ग्रह**-पु., **शकृद्विबन्धः** ( चचि. १३.३८ )
विष्ठेचा अवष्टंभ, मलावष्टंभ.

**-ग्राहिन्**-वि., मलग्राही ( सुचि, ३४.१२ )
मलावष्टंभ करणारे, मळ बांधणारे.

**–निरसनी**–स्त्री., **धमनीभेदः** ( असंशा. ६.३२ ) धमनीचा प्रकार. विष्ठा बाहेर टाकणारी.

**–निरोध**–पु., **लक्षण० पुरीषस्याप्रवर्तनम्** ( सुउ. ५६.८ ) शौचास न होणे.

**–भेद्**–पु., **द्रवमलत्वम्** ( असंनि. १३.१३ ) विष्ठा फुटणे, मळ ढिला होणे. पातळ होणे.

**–वाहिस्रोतस्**–न., **स्रोतोभेदः** ( चवि. ५.२१ ) **द्र० ' स्रोतस् '** स्रोतसांचा एक प्रकार. विष्ठावाहक स्रोतस.

**वर्चीवा**–स्त्री., **वनस्पति० पुनर्नवाभेदः** ( कासं खिल. १४ ) **द्र० ' पुनर्नवा '** पुनर्नवा, एक प्रकार.

**वर्चोऽप्रवर्तन**–न., **लक्षण० पुरीषवेगधारणहेतुकर-पुरीषाप्रवृत्तिः** ( चसू. ७.८ ) विष्ठेच्या विसर्जनाचा वेग अडवण्यामुळे मलप्रवृत्ती न होणे.

**वर्ज्य**–वि., **अनुपक्रम्यः अचिकित्सनीयः** (सुचि. ८.३३) उपचाराला वर्ज, उपचारांचा उपयोग नाही म्हणून वर्ज.

**वर्ण**–पु., **अक्षरम्** ( चवि.८.३८ ) अक्षर, वर्ण.
**शरीरकान्तिः** ( सुशा. ४.४ ) शरिराची कांति, वर्ण.
**जातिः ब्राह्मणक्षत्रियादिः** ( सुसू. २९.५ ) ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादी चार वर्ण. जाति.
**कला** ( र. ५.९ ) कला. ( १६ कला )

**–दात्री**–स्त्री., **वनस्पति० हरिद्रा** ( रा. ६.७९ ) हळद. वर्ण चांगला करणारी.

**–नाश**–पु., **लक्षण० वर्णहानिः** ( चचि. ४.२७ ) वर्ण कमी होणे, बिघडणे.

**–पञ्चक**–न., **शुक्लादि पञ्चवर्णाः–शुक्ल–हरित–कृष्ण–पीत–रक्ताः पञ्च** ( सुनि. ६.२६ ) पांच वर्ण. पांढरा हिरवा काळा पिवळा व लाल.

**–पुष्पी**–स्त्री., **वनस्पति० उष्ट्रकाण्डी** (रा परि. १०.४३) लाल फुलाची वनस्पती.

**–पूरक**–पु., **वनस्पति० शालि** (ध.६.७१) साळ, तांदूळ.

**–प्रणाश**–पु., **वर्णनाशः** ( चसू. १६.१५ ) वर्ण कमी होणे, नष्ट होणे.

**–प्रसाद्**–पु., **शरीरकान्तिः** ( सुसू. १५.५ ) वर्ण स्वच्छ सुन्दर असणे. प्रसन्न वर्ण.

**–प्रसादन**–न., **वनस्पति० काष्ठागरु** ( रा. १२.४२ ) अगरूचा एक प्रकार. वर्ण प्रसन्न करणारा.

वि., **वर्णवैशद्यकरः** ( सुसू. ३८.२५; अहसू. १५.४४ ) वर्ण स्वच्छ करणारा.

**–भेद्**–पु., **गौरादिवर्णान्यत्वम्** ( सुसू. १५.२६ ) काळा गोरा इत्यादींपैकी एका वर्णाचा.

**–भेदिनी**–स्त्री., **वनस्पति० प्रियङ्गुः** ( ध. ३.१६ ) गव्हला, वर्णभेदक.

**–मूषा**–स्त्री., **मूषा० एषा वर्णोत्कर्षकरी** ( र. १०.१७ ) धातु पारा त्यांचा वर्ण उत्कृष्ट करणारी मूस.

**–वती**–स्त्री., **वनस्पति० हरिद्रा** ( ध. १.५४ ) हळद. वर्णवान्.

**–विलासिनी**–स्त्री., **वनस्पति० (हरिद्रा** ध. १.५५) हळद. वर्ण खुलविणारी.

**–वृद्धा**–स्त्री., **वर्णश्रेष्ठा, यथा शूद्रो न वैश्यम् परिणयेत उपेयाद्वा वैश्यो न क्षत्रियां, क्षत्रियो न ब्राह्मणीमिति** ( ड. सुचि. २४.११५ ) वर्णात श्रेष्ठ स्त्री. शूद्रीपेक्षा, वैश्या; वैश्यापेक्षा क्षत्रिया; क्षत्रियापेक्षा ब्राह्मणी स्त्री श्रेष्ठ. विवाह वा समागम श्रेष्ठवर्ण स्त्रीशी वर्ज.

**–शुद्धि**–स्त्री., **लक्षण० सम्यक् विरिक्तस्यैकं लक्षणम्** ( चसू. १६. ५ ) रेचक चांगले लागू झाल्याचे एक लक्षण. वर्ण स्वच्छ, निर्दोष, शुद्ध होणे.

**–स्वरीय**–वि., **अध्यायसंज्ञा० वर्णस्वरावधिकृत्य कृतोऽध्यायः** ( चइ. १.१ ) एक अध्याय. वर्ण व स्वर यांच्या बद्दल माहिती यात आहे.

**वर्णक**–पु., **वर्णकरं द्रव्यम्** ( चचि. ७.९२ )
**त्वचो वर्णकरं चूर्णम्, दुष्टवर्णकेन त्वग् दूष्यते,** ( चचि. २३.११८ ) त्वचेचा वर्ण चांगला करणारे चूर्ण. वर्णकर द्रव्य विषदुष्ट झाल्यास त्वचा दुष्ट होते.
**वनस्पति० कम्पिल्लकः** ( सुचि. २५.३९ ) कपिला.
**वनस्पति० चन्दनम्** ( सुचि. २५.३८ ) चंदन.
**रोचनिका, अस्यास्त्वक् नारीक्षीरेण पिष्ट्वा पित्ताभिष्यन्देऽञ्जनम्** ( सुउ. १०.१० ) रोचनिका ह्या वनस्पतीची साल स्त्रीच्या दुधात वाटून पित्ताने झालेल्या नेत्रविकारावर अंजनास उपयुक्त.

**(वर्णिका)**–स्त्री., **धातुवादोद्दिष्टो विशिष्टो वर्णः** ( र. ८.४९-५० ) धातुवादात सांगितलेला विशिष्ट वर्ण.

**वर्णाधिकार**–पु., वर्णानधिकृत्य यदुच्यते तत् प्रकरणम् ( चइ. १.८ )
ज्यात वर्णविषयक सांगितले आहे असे प्रकरण.

**वर्णिनी**–स्त्री., वनस्पति० हरिद्रा ( रा. ६.८० ) हळद.
ब्रह्मचारिणी (अहृसू. ७.७) ब्रह्मचारिणी.

**वर्ण्य**–वि., वर्णकरम्, वर्णाय हितम् इति वर्ण्यम् ( चसू. १.८७ ) वर्णाला हितकर, वर्णकारक.
साध्यम् ( चवि. ८.३४ )
साधावयाचे ते. वर्णावयाचे, साध्य करावयाचे ते.
साध्यधर्मो यत्र वर्ण्यते स, पक्षः दृष्टान्तश्च वर्ण्य इति ( चवि. ८.५७; अहृसू. १५.२७; र. ३.११० ) साध्याचा धर्म जेथे वर्णिला जातो तो. पक्ष व दृष्टांत हे दोन्ही वर्ण्य होत.

**–पुष्पक**–पु., वनस्पति० राजतरणी ( रा. १०.२४६ ) पिवळी शेवंती.

**–वर्ग**–पु., द्रव्यगण० चन्दनतुङ्गपद्मकोशीरमधुकमंजिष्ठासारिवापयस्यासितालता इति दशेमानि वर्ण्यानि भवन्ति ( चसू. ४.१० )
चंदन, पुन्नाग, पद्मकाष्ठ, काळावाळा, ज्येष्ठमध, मंजिष्ठा, अनंतमूळ, भुईकोहळा, पांढरी व काळी दूर्वा ही दहा द्रव्ये वर्णाला हितकर.

**–सम**–पु., तन्त्रयुक्ति० हेत्वाभासभेदः वर्ण्येन साध्येन दृष्टान्तोऽसिद्धत्वेन सम इति वर्ण्यसमः ( चवि. ८.५७ )
असिद्ध हेत्वाभास. जो हेतु ( उदाहरण ) साध्या सारखा ( असिद्ध ) असतो तो. जसे कुणी म्हणेल बुद्धि अनित्य आहे, स्पर्शरहित आहे जसा शब्द. यामध्ये शब्द हाही (अनित्य म्हणून) असिद्ध, आणि बुद्धीही (अनित्य म्हणून) असिद्ध. ते दोन्हीही सारखेच असिद्ध ( शब्द व बुद्धी ) असल्यामुळे हा असिद्ध ( वर्ण्य सम ) हेत्वाभास ठरतो.

**वर्त**–न., वर्तुलीकरणम्, वायोरेकं कर्म ( चसू. २०.१२ ) वर्तुळ करणे, वाताचे एक कर्म.
वर्तलोहम् ( र. ५.३-४ ) मिश्र लोह. मिश्रधातु.

**–तीक्ष्ण**–न., खनिज० वर्तलोहम् ( रा. १३.३४; र. ५.२२३ )
मिश्र लोखंड, मिश्र पोलाद.

**–मान**–वि., क्रियाविशेषवान् ( सुसू. २.६ )
विशेष क्रिया करणारा.
वि., प्रवर्तमानम् ( सुशा. ३.११ )
प्रवृत्त होणारा. कार्य करीत असलेला.

**–लोह**–न., खनिज० वर्तलौहम् ( ध. ६.३३ )
मिश्र धातु.

**–लौह**–न., खनिज० वर्तलोहम्, गुणाः–अम्लकटुकं शीतं रूक्षं कफपित्तकृमिघ्नं रुच्यं त्वच्यं मलशुद्धिकरं च ( र. ५.२२१ ) तस्य निर्माणविधिः–वर्तलौहं 'भर्त' इति ख्यातं वर्तते। कांस्यार्करीतिलोहादिजातं वर्तलोहं वर्तते। वर्तलोहं पञ्चलोहाख्यं पञ्चलोहपर्यायं भवति। ( र. ५.२२० ) तस्य शोधनम्–भर्ताख्यो धातुरग्निना द्रावितः सन् अश्वमूत्रे प्रक्षिप्तश्च विशुध्दयति। सप्तधेति संप्रदायः ( र. ५.२२३ ) तस्य मारणम्–गन्धकहरितालाभ्यां पुटितं वर्तलौहकं क्रियते ( र. ५.२२४ )
कासे, तांबे, पितळ, लोखंड, शिसे, या सर्व धातूंच्या मिश्रणाने बनलेला मिश्रधातु, पंचधातु. गुण– आंबट, तिखट, थंड, रूक्ष, कफपित्त, कृमिनाशक, रुचीला, त्वचेला हितकर, व मलशुद्धिकर. त्याला पंचधातु, पंचलोह किंवा भर्त ही म्हणतात. कासे, तांबे, पितळ, लोह, नाग यापासून हे होते. शुद्धि– हा पंचधातु अग्नीने पातळ करून घोड्याच्या मुतात सातवेळ टाकावा. मारण– गंधक, हरताळ यांच्या बरोबर पुट दिल्याने भस्म होते.

**वर्तक**–पु., विष्किरपक्षी० गुणाः–कषायः कटुर्लघुः मेध्याग्निवर्धनवृष्यग्राहिवर्णप्रसादकरो वातघ्नश्च ( ध. ६.७५; असंसू. ७.७० )
हिं.—बटेर.
**म.—गांजीणपक्षी.**
बं.—बाटेर.
**मांसाचे गुण**—तुरट, तिखट, हलका, बुद्धीला चांगला, अग्निवर्धक, शुक्राला हितकर, वर्ण चांगला करणारा व वातनाशक.
वर्तीरभेदः (ड. सुसू. ४६. ५९; अहृसू. ६. ५०; ध. वर्गेतराणि. १० ) कवड्याचा प्रकार.
खनिज० वर्तलौहम् ( ध. ६.३३ ) मिश्रधातु.

**(वर्तिका)**–स्त्री., पक्षि० वर्तकसदृशः कश्चित्पक्षी ( चसू. २७.४८ ) गांजीणपक्ष्यासारखा एक पक्षी.
वर्तीरभेदः ( ड. सुसू. ४६.५९; अहृसू. ६.४५ )
कवडापक्ष्याचा प्रकार
भैषज्य० अजशृङ्गी ( ध. १.८७ ) मेढशिंगी.

**वर्तन**(परिव०)–न., यापनम् रक्षणम् ( अहृसू. १.७ )
रक्षण. निभवणे, घालवणे.

शयो विशेषेण वातस्थानम्' ( चसू. २०.८ )
वातकोपः— 'वयोऽहोरात्रिभुक्तानामन्ते वातस्य कोपो भवति ( अहृसू. १.८ ) चयप्रकोपप्रशमाः क्रमेण ग्रीष्मवर्षाशरत्सु जायन्ते ( अहृसू. १२.२४ ) 'भूयिष्ठं वर्धते वायुर्वार्धक्ये ( सुसू. ३५.३१ ) जीर्णेऽन्ने वर्धते वायुः ( सुसू. ४६.४८४ )
वातेनाग्निर्विषमो भवति ( अहृसू. १.८ )
वातेन कोष्ठः क्रूरो भवति ( अहृसू. १.९ )
वातप्रकृतिः-यदा वातदोषः शुक्रशोणिते अधिको भवति तदा स वातप्रकृतेर्हेतुर्भवति ( असंशा. ८ )
वातेन हीना दोषप्रकृतिर्भवति ( अहृसू. १.९-१० )
वातगतिः-क्षयः स्थानं वृद्धिश्चेति दोषाणां त्रिविधा गतिः। अपरा च ऊर्ध्वाधस्तिर्यग्भेदेन त्रिविधा। कोष्ठशाखामर्मास्थिसंधिषु च त्रिविधा। कालप्रकृतिश्चयप्रकोपप्रशमरूपा प्राकृततो वैकृततश्च वाताद् भवति
( चसू. १७.११२-११५ ) वातचयकोपहेतुः-चीयते लघुरूक्षाभिरौषधीभिः समीरणः। तथैव आहारादिना ( अहृसू. १२.२४-२८ ) 'उष्णेन युक्ता रूक्षाद्याः वायोः कुर्वन्ति सञ्चयम्। शीतेन युक्तारूक्षाद्याः गुणाः-वायोः प्रकोपं कुर्वन्ति ( अहृसू. १२.१९-२० ) धातुक्षयात्तथा मार्गावरणेन वेगप्रतिबन्धाच्च वायुः कुपितो भवति ( चचि. २८.५९ ) रूक्षलघुशीतवमनविरेचनाऽऽस्थापनशिरोविरेचनातियोगव्यायामवेगसन्धारणाऽनशनाभिघातव्यवायोद्वेगशोकशोणितातिषेकजागरणविषमशरीरन्यासेभ्योऽतिसेवितेभ्यो वायुः प्रकोपमापद्यते (चनि. १.१९) अत ऊर्ध्वं प्रकोपणानि वक्ष्यामः। तत्र बलवद्विग्रहातिव्यायामव्यवायाध्ययनप्रपतनप्रधावनप्रपीडनाभिघातलङ्घनप्लवनतरणरात्रिजागरणभारहरणगजतुरगपदातिचर्याकटुकषायतिक्तरूक्षलघुशीतवीर्यशुष्कशाकवल्लूरवरकोद्दालककोरदूषश्यामाकनीवारमुद्गमसूराढकीहरेणुकलायनिष्पावानशनविषमाशनाध्यशनवातमूत्रपुरीषशुक्रच्छर्दिक्षवथूद्गारबाष्पवेगविघातादिभिर्विशेषैः वायुः प्रकोपमापद्यते ( सुसू. २१.१९ )
तिक्तोषणकषायरससेवनैस्तथा वर्षासु अहोरात्रिभुक्तान्ते च समीरणः कुप्यति (अहृनि. १.१४-१५; असंनि. १.२६ ) अन्यदोषपूर्णेभ्यःस्रोतोभ्य आवरणं प्राप्य बली वातः कुप्यति ( असंनि. १५ )

वातक्षयहेतुः—वातगुणस्य विपरीतगुणानां स्निग्धगुरूष्णादीनां देहे वर्धनेन वातदोषस्य क्षयो भवति ( अरु. अहृसू. ११.२४ ) गुरुस्निग्धादिभिरोषधीभिर्वातस्य शमो भवति ( अहृसू. १२.२५ )
वातवृद्धिलक्षणानि—तत्र वातवृद्धौ वाक्पारुष्यं कार्श्यं कार्ष्ण्यं गात्रस्फुरणमुष्णकामितानिद्रानाशो गाढवर्चस्त्वं च भवति (सुसू. १५.१३) संज्ञानाशबलेन्द्रियोपघातास्थिशूलमज्जाशोषमलसङ्गाध्मानाटोपमोहदैन्यभयशोकप्रलापादिभिर्वृद्धो वायुः पीडयति ( असंसू. १९.६; असंसू. ११.५-६ ) गर्भिण्याः प्रकुपितो वातो गर्भाशयेऽवतिष्ठमानो गर्भस्य जडबधिरमूकमिन्मिणगद्गदखञ्जकुब्जवामनहीनाङ्गाधिकाङ्गत्वान्यन्धं वा वातविकारं करोति (असंशा.२) वातक्षयलक्षणानि-प्रसेक-अरुचि-हृल्लाससंज्ञा-मोह-अल्पवाक्चेष्टता-प्रहर्ष अङ्गसादअग्निवैषम्यादिभिः क्षीणो वायुः देहं पीडयति ( असंसू. १९ ) श्लेष्मवृद्धियुक्तानां रोगाणामुत्पत्तिर्भवति ( अहृसू. ११.१५ ) वातक्षये स्वयोनिवर्धनं यदन्नपानं तत्प्रकाङ्क्षति। यथा यवमुद्गहरेणून् रूक्षलघुभोजनं कषायकटुतिक्तं च भोजनम् ( ड. सुसू. १५.२९-३१ ) सामनिरामवायुलक्षणम् आमयुक्तो वायुः कुक्षिपीडादीन् करोति ( असंसू. २१ ) तन्द्रास्तैमित्यगौरवस्निग्धत्वारोचकालस्यशैत्यशोफाग्निहानिभिः कटुरूक्षाभिलाषेण तद्विधोपशयेन च सामो वातो ज्ञेयः (असंनि. १६) यदा तन्द्रास्तैमित्यादीनां विपर्ययस्तदा निरामो वातो ज्ञेयः ( असंनि. १६ ) आमविपर्यये तु पक्वत्वम् ( असंसू. २१ ) अवयवगतवातलक्षणम्—त्वग्गतसमीरणलक्षणम्—वैवर्ण्यस्फुरणरौक्ष्यसुप्तिचुमचुमायननिस्तोदनत्वग्भेदपुटनानि
( चचि. २८.३; सुनि. १.२५; असंनि. १५ )
रक्तगतसमीरणलक्षणानि—तीव्रसन्तापरुजा वैवर्ण्यकृशताऽरुचयः गात्रे अरुंषि, भुक्तस्य स्तम्भः ( चचि. २८.३१ ) व्रणान्करोति ( सुनि. १.२६ ) सूचिभिरिव निस्तोदनं स्पर्शद्वेषः प्रसुप्तता पित्तविकाराश्च ( सुनि. १.३०-३४ ) भ्रमं करोति (असंनि. १५) मांसाश्रितः—सशूलान्ग्रन्थीन् करोति ( सुनि. १.२६ ) मेदोगतः—मन्दरुजोऽव्रणान्ग्रन्थीन् करोति ( सुनि. १.२६ ) मांसमेदोगतः—अङ्गगुरुता दण्डमुष्टिहततोदः, सरुक्श्रमः ( चचि. २८.३२ )

कर्कशान्ग्रन्थीन्भ्रमं च करोति (असंनि. १५) अस्थिगतः—अस्थिशोषम् अस्थिभेदम् अस्थिशूलं च करोति (सुनि. १.२८) सक्थिसन्ध्यस्थिशूलं तीव्रं बलक्षयं करोति (असंनि. १५) मज्जगतः—मज्जा-शोषं रुजं च करोति (सुनि.१.२९) अस्थिषु सौषिर्यमस्वप्नं स्तब्धतां च (असंनि. १५) मज्जास्थिगतः—अस्थिभेदपर्वभेदसंधिशूलो मांसबलक्षयोऽनिद्रता संतता रुक् च (चचि. २८.३३) शुक्रगतः—ग्रथितवर्णादियुक्तं शुक्रं करोति, तथा शुक्रस्याऽतिशीघ्रप्रवृत्तिमतिमन्दप्रवृत्तिं वा करोति (सुनि. १.२९) गर्भस्य शीघ्रमुत्सर्गं गर्भसंगं गर्भविकृतिं च करोति (असंनि. १५) आमाऽऽशयस्थितः—हृन्नाभिपार्श्वोदरपीडां तृष्णामुद्गारं विसूचिकां कासश्वासौ कण्ठाऽऽस्यशोषं च करोति (चचि. २८.२७-२८) नाभिस्थः ऊर्ध्वस्थान्गदान्करोति (असंनि. १५) छर्द्यूर्ध्वगतरक्तपित्तमोहमूर्च्छाहृद्ग्रहपार्श्ववेदनादीन्करोति (सुनि.१.२२-२३) पक्वाशयस्थो वातोऽन्त्रकूजनं शूलाऽऽटोपौ कृच्छ्रमूत्रपुरीषत्वं त्रिकवेदनां, श्रोत्रादिष्विन्द्रियवधं च कुर्यात् (चचि. २८.२८-२९; सुनि. १.२३, सुशा. २.५३) अश्मरीवर्ध्माऽर्शोरोगांस्तथाऽधरकायस्थान्कृच्छ्रानुपद्रवान्करोति (असंनि. १५) शिरागतो वातः शूलं सिराऽऽकुञ्चनपूरणं च करोति (सुनि. १.२७) सिरास्वाध्मानरिक्तते करोति (असंनि. १५) स्नायुप्राप्तो वातः स्तम्भकम्पौ शूलमाऽऽक्षेपणं च कुर्यात् (सुनि. १.२७)गृध्रसीमाऽऽयामं कुब्जतां च करोति (असंनि. १५) संधिगतो वातः जृम्भां ज्वरं च करोति (चचि.८.१७) आकुंचनप्रसारणादिक्रियां हन्ति, संधिशूलशोफौ करोति (सुनि. १.२८) शोफस्य वातपूर्णदृतिस्पर्शं प्रसारणाऽऽकुंचनयोस्सवेदनां प्रवृत्तिं च करोति (असंनि. १५)
पार्श्वस्थः पार्श्वशूलं गुदस्थितो वर्चोभेदम् उरःस्थश्चोरःशूलं करोति (चचि. ८.१७) कोष्ठेऽर्शोभिः विण्मूत्रवातानां ग्रहशूलाध्मानाऽश्मशर्कराः करोति (चचि. २८.२६) रुद्धो वातोऽग्निमान्द्यं करोति, मेदसा रुद्धो वातोऽग्निवृद्धिकृद्भवति (असंसू. ७) प्राणवहस्रोतःसंरुद्धो वातोच्छ्वासनिःश्वासरोधं करोति मरणं वाऽऽपादयति (चचि. २३.६५) शरीरावयवगतो वातोऽमितान्गदान्करोति (सुनि. १.३२) आवृतमार्गो वातो बाह्याः शिराः प्राप्योच्छेदलिङ्गं श्वयथुं करोति (चचि. १२.८) एकधातुगतो वातः उपेक्षितः सर्वधातुगतो भवति, सर्वदेहाश्रितस्तम्भनाऽऽक्षेपस्वापशोथशूलान्करोति (सुनि. १.३१) संध्याऽऽकुंचनकम्पनं च करोति (असंनि. १५) श्रोत्रादीन्द्रियगतो वातः इन्द्रियवधं करोति, श्रवणादिशक्तिं नाशयति (असंनि. १५) यदा तून्मार्गगो वातो गर्भस्य रसवहानि स्रोतांसि शोषयति तदा वातरोगी हीनाङ्गो वा भवति (असंशा. २) प्रकुपितो वातोऽशीतिवातविकारान्करोति (चसू. २०.९-११) सर्वेषामपि रोगाणामुत्पत्तौ वायोः परं हेतुर्नास्ति (अहसू. १९.८५-८६) पाणिपादच्छेदे मर्मव्यधे च अतिस्रुतितो विकृतेन वातेन मरणं भवति (असंशा. ७.३२) वातस्य शुभाऽशुभलक्षणम्—मृदुः शीतोऽनुकूलश्च सुगन्धिः वातः शुभः खरोऽनिष्टगन्धिरुष्णः तु अनिष्टः (सुसू. २९.४१)

वातशमनः उपक्रमः—वातविपरीतगुणैर्द्रव्यैः मारुतः संप्रशाम्यति (चसू. १.५९) स्नेहस्वेदाऽभ्यङ्गबस्तिस्नेहविरेचनशिरःस्नेहशिरोबस्तिमृदुशय्याऽग्निसन्तापब्रह्मचर्यादीनि वातरोगेषु योज्यानि (सुचि. ४.२१-२६) शाखागतवातेषु विशेषेण बस्तिः प्रशस्तः (चसि. १.३२) आमाशयगते वाते प्रथमं वमनं देयम् (सुचि. ४.३) पक्वाशयगते वाते स्नेहयुक्तं विरेचनं दद्यात्, शोधनद्रव्ययुक्तो बस्तिरपि तत्रोपयुक्तः (सुचि. ४.५) आमाशयगते वायौ रुक्षपूर्वं स्वेदमाचरेत् (असंसू. २६) त्वङ्मांसरक्तसिरागते वाते स्नेहाभ्यङ्गोपनाहमर्दनालेपनरक्तमोक्षैरुपचरेत् (सुचि. ४.७) स्नायुसन्ध्यस्थिगते वाते स्नेहोपनाहाग्निकर्मबन्धनोन्मर्दनरूपाचिकित्सा (सुचि. ४.८) स्त्रीणां वातोपद्रवेषु बस्तिचिकित्सा प्रशस्ता (चसि. १.३४) अतिबले वाते रसायनचिकित्सोपयुक्ता भवति (चचि. १ (३) २९)

**वात.**—महाभूत, पंचमहाभूतांपैकी एक. वायु, अनिल, समीरण इत्यादी त्याचे पर्याय होत. ह्या शब्दात मूळ धातु 'वा' असा आहे. त्याचा अर्थ गतिवाचक वाहणे असा व वास घेणे असा आहे. त्यास क्त् प्रत्यय लागून वात (कर्तरीरूप) असे रूप झाले आहे. जो वाहतो तो वात. नेहमी गति

असणारा. शब्द व स्पर्श हे दोन गुण असलेला वायु शब्द तन्मात्रे सहित स्पर्शतन्मात्रेपासून झालेला आहे. वायु ह्या शब्दाने म्हटला जाणारा स्वयम्भू भगवान् वायु हा स्वतंत्र असल्यामुळे. नित्य असल्यामुळे, सर्वव्यापी असल्यामुळे, सर्वांचाच आत्मा असलेला, सर्वांना पूज्य असा तो चराचर अशेष भूतांच्या स्थिति, उत्पत्ति व विनाशाचे कारण आहे. बाहेरचा म्हणजे पृथ्वीवरील अवकाशातील वायु. म्हटले जाते कल्याण कारक असा वायु वाहातो. प्राण व शुद्धि देणाऱ्या सर्वकारणांमध्ये वायु श्रेष्ठ. त्याचप्रमाणे, तो सर्व शरीरधारी प्राण्यांचे धारण करणारा आहे. तो जगाचे धारण करणारी देवताच आहे. वायूच्या ठिकाणी वात आणि आकाश ह्या दोन देवता आश्रित आहेत. त्वचेचे अधिदैवत वायु हे आहे. जसे रक्षामन्त्रात सांगितले आहे की, " अग्नि तुझ्या जिभेचे रक्षण करो त्याच प्रमाणे वायु तुझ्या प्राणाचे रक्षण करो." ह्या जगाचे हिताहिताचे कारण दुष्ट न झालेला व दुष्ट झालेला एकमेव वायु हाच आहे. ( विशेषतः शरिराचे बाबतीत ) हा विश्व घडवणारा विश्वाचा आत्मा, विश्वस्वरूप, प्रजोत्पत्ति करणारा, सृष्टिनिर्माण करणारा, धारक, सर्वव्यापी, विश्व जसे आहे तसे ठेवणारा, संहार करणारा, असा आहे म्हणून तो दुष्ट न होऊ देण्यासाठी प्रयत्न करावा. तो एक शरीर भाव (घटक) आहे. **त्याची उत्पत्ति**-वायु व आकाश धातूपासून वायु उत्पन्न झाला. शरिराचे तो धारण करतो म्हणून धातु म्हटला जातो. शरिराबरोबरच उत्पन्न झाल्यामुळे व शरिराचे धारण करीत असल्यामुळेच धातु हे नाव त्याला प्राप्त झाले आहे. तो प्राकृत असताना शरीर उत्पत्तीचे कारण असतो. व त्यामुळेच ज्या प्रमाणे खांब घराचे धारण करतो त्या प्रमाणे तो ह्या शरीररूपी घराचे धारण करतो. ज्या प्रमाणे बाहेरचा वायु जगाचे धारण करतो त्याप्रमाणे शरिरातला वायु शरिराचे धारण करतो. **त्याची उत्पत्ति**- अग्नि जास्त व आहार कमी झाल्यामुळे किंवा याच्या उलट परिस्थितीमुळे त्यांच्या त्या त्या प्रकारच्या विशेष, संयोगापासून अमूर्त, शब्दयुक्त, किंचित किंवा अधिक शब्द असलेला पाचही वायूचा आत्मस्वरूप असा वायु कोष्ठामध्ये उत्पन्न होतो. वायु चल असल्यामुळे रजोगुणाधिक आहे. बारा प्राणांपैकी वायु हा एक प्राण आहे. वायु हा दोषधातुमलादिकांचा सर्व शरिरात संचार करवून उच्छ्वास व निःश्वास क्रियांच्या द्वारे जीवन चालवतो. दूषित करणे ह्या स्वभावामुळे वायूला दोषही म्हटले आहे. वात पित्त व कफ हे शारीर दोष आहेत. त्या **त्रिदोषांपैकी वायु एक आहे.**—ह्या तीन ही दोषांचा समुदाय प्राकृत असला तर शरिराला उपकारक होतो. **वायूचे प्राकृतावस्थेतील कर्म**— उत्साह, उच्छ्वास, निःश्वास, स्पंदन, इन्द्रियांची कार्यक्षमता, मलमूत्रादिकांचे वेग निर्माण करणे या क्रियांनी वायु शरिराला उपकारक होतो. **वायु हा एक मल**—आहाराचा मल म्हणून आणि शरिराला मलिन करतो म्हणून पक्वाशयातील अन्नाच्या किट्टापासून तयार होतो असा वायु (मल) होय. वायूचे **गुण व स्वरूप**—सूक्ष्म रूक्ष, हलका, चल, प्रमाणाने पुष्कळ, शीघ्रगति थंड, खरखरित, स्वच्छ असतो. वायु हा स्वतः अव्यक्त असून ह्याची कर्मे व्यक्त असतात. खरखरित असून शब्द व स्पर्श गुणवान रजोगुणाधिक, अचिन्त्य सामर्थ्यवान, सर्व दोषांचा नेता, झटपट क्रिया करणारा, शीघ्रसंचारी, स्वतंत्र, सर्व शरिराच्या हालचालींचा आणि तिन्ही मार्गातील रोगांचा कारण आहे. तुरट, कडु व तिखट हे वायूचे अनुमानाने रस मानले असून तुरट रस हा वायूशी समान धर्मी मानला आहे. वायु हा जिवंत ठेवतो, जीवन चालवतो, म्हणून त्याला प्राण म्हटले आहे. जेव्हा वायु सम व कोठेही अडथळा न येतां शरिरात संचार करतो, तेव्हा मनुष्य शंभर वर्षे निरोगीपणे जगतो. वायु हा शरीर व शरिराचे सांधे ही धारण करतो. प्राण, उदान, समान, व्यान, आणि अपान ह्या पाच स्वरूपात तो आहे. बऱ्यावाईट सर्व हालचालींचा प्रवर्तक, मनाचा प्रेरक, व नियमन करणारा, सर्व इन्द्रियांना आपआपल्या विषयांकडे उद्युक्त करणारा, सर्व इन्द्रियांच्या विषयांचे ग्रहण करणारा, सर्व शरीर धातूंचा संग्रह व रचना करणारा शरीर घटकांना सांधणारा, वाणीचा प्रवर्तक, शब्द आणि स्पर्श यांचे

मूल कारण श्रवण आणि स्पर्शन ह्यांचेही मूल कारण आहे. हर्ष आणि उत्साह हे व्यक्त होण्याचे कारण. अग्नीचा प्रेरक, दोषांचा संशोषक, मलांना बाहेर फेकणारा, स्थूल आणि सूक्ष्म स्रोतसांचा भेदक गर्भाची आकृति घडवणारा, आयुष्याची म्हणजे जीवन चालू असल्याची साक्ष पटवणारा असा असतो. पण ही सर्व कार्ये तो वायु कुपित नसेल तरच नीट घडतात, शरिरात दोष–धातु–अग्नीची समता ठेवून विषयांची सम्यक् प्राप्ती आणि क्रिया यथा योग्य तऱ्हेने करणारा असाही तो आहे. वायूचे कर्म २ प्रकारचे– सामान्य व विशेष. इंद्रियांचे विषय ग्रहण करणे हे सामान्य आणि प्राणादि वायूंकडून देह धारण करणे हे विशिष्ट कार्य. स्वतःच्या शिरांमध्ये संचार करून पाच ज्ञानेन्द्रियांची, मनाची, बुद्धीची, आपापल्या विषयांमध्ये स्वाभाविक प्रवृत्ति झाली असताना वायु मोह होऊ देत नाही. वायूचे परमाणू शरिरात घटकांचा संयोग विभाग व हालचालीचे नियंत्रण, आकुंचन–प्रसरण क्रिया, कोष्ठ, अवयव, आणि धातु यांचे ठिकाणी चेतनाही निर्माण करतो आणि स्रोतसांचे विभजन करतो. परमाणूंच्या संयोग विभागाला कारण वायु आणि नित्य कार्य करणे हा त्याचा स्वभाव आहे. जेव्हा संयोजक स्वभावी कर्माने वायु युक्त होतो तेव्हा परमाणूंचा संयोग करून शरिराला कार्यक्षम करतो आणि जेव्हा विघटन–स्वभावी कर्माने वायु युक्त होतो तेव्हा विभाग म्हणजे परमाणूंचा नाश करतो. **प्रकुपित झालेल्या वायूचे कर्म**– नाना प्रकारच्या विकारांनी शरिरास त्रास देतो. बल, वर्ण, सुख, आयुष्य ह्यांचा घात करतो, मनाला दुःख देतो. सर्व इन्द्रियांचा नाश करतो, गर्भाचा नाश करतो, गर्भ विकृत करतो किंवा बरेच काळ-पर्यंत धारण करतो, भीति, शोक, मोह, दैन्य, प्रलाप निर्माण करतो. प्राणांचा अवरोध करतो. याच्या कोपाने सन्धी आखडतात, जखडतात, फुटल्यासारखे वाटतात, हाडांमध्ये फुटल्या-सारखी वेदना होते. रोमांच उभे राहातात. मनुष्य बडबडतो; हात, पाय, पाठ, डोके, ही जखडतात. लंगडेपणा, पांगळेपणा आणि कुबडेपणा निर्माण होतो; अंग सुकते, झोप नाहीशी होते; शुक्र, रज, गर्भ यांचा नाश होतो, अवयवात स्फुरण होते; मान, डोके, नाक, डोळे आणि गळसरीचे हाड ही वाकडी होतात. फोडल्यासारखी, टोचल्यासारखी पीडा, झटके, मूर्च्छा, थकवा निर्माण होतो. शिवाय कारणे आणि विकृतीचे स्थान यांना अनुसरून हा कुपित वायु निरनिराळे रोग उत्पन्न करतो, अवयव ढळणे, ताणणे, मलादिकांचा अवरोध होणे, अंग गळणे, फुटणे, टोचणे, रोमांच उभे राहाणे, तहान, पेटके येणे, कुसकरल्याप्रमाणे वाटणे, घशात सुया टोचल्याप्रमाणे, अवयव वळल्याप्रमाणे किंवा फुटल्याप्रमाणे वाटणे, शूल, सुकणे, स्पर्श न कळणे, खरखरितपणा, पोकळपणा वाटणे, आकुंचन, स्पंदन होते, तोंड तुरट रसाचे होते, काळा व तांबूस वर्ण निर्माण होतो. **वाताचे प्रकार**—वायु प्राणादि भेदाने पाच प्रकारचा आहे. प्राण, उदान, समान, व्यान व अपान; यांपैकी **प्राण** वायु जीवन चालवितो. **उदान** वायु बल टिकवून धरतो. **समान** वायु अग्नि प्रदीप्त करतो. **व्यान वायु**–रसधातु सर्व शरीरभर फिरवतो शरिराच्या सर्व हालचाली व्यानावरच अवलंबून आहेत. **अपान वायु**–शुक्र, रज, पुरीष, मूत्र, गर्भ ह्यांना शरिराबाहेर घालवितो. **वाताचे शरिरातील ठिकाण**–पक्वाशय पक्वाधान (कंबर) मांड्या, कान, हाडे व त्वचा तसेच नाभीच्या खालील भाग वाताचे ठिकाण आहे. विशेषेकरून पक्वाधान व गुद त्यातही पक्वाशय हे मुख्य स्थान होय. **वाताचा प्रकोप** वय, दिवस रात्र व जेवण ह्यांच्या शेवटच्या भागात वाताचा प्रकोप होतो. वाताचे संचय-प्रकोप शमन हे क्रमाने ग्रीष्म, वर्षा व शरद ऋतूत होतात. वृद्धावस्थेत व अन्न पचल्यावर वात अधिक वाढतो. वातामुळे अग्नि विषम असतो, वातामुळे कोठा जड असतो. **वातप्रकृति**– जेव्हा शुक्र व आर्तवामध्ये वातदोष अधिक असेल तेव्हा तो वातप्रकृति जीवाच्या जन्माला कारणीभूत होतो. वातामुळे होणारी प्रकृति ( वातप्रकृती ) ही हीन असते. **वाताच्या गति**–प्रमाणापेक्षां कमी होणे, प्रमाणातच राहाणे व प्रमाणापेक्षा जास्त होणे अशी दोषाची तींन प्रकारची गती संभवते. त्याच प्रमाणे वर खाली व तिरकी ( शाखेमध्ये ) अशी दुसरी तीन प्रकारची गति संभवते. कोठा, शाखा व मर्मे हाडे आणि सन्धि अशी आणखी तीन प्रकारची गति संभवते. काल, प्रकृति, चय प्रकोप, शमन, यांना अनुसरून प्राकृत व वैकृत ह्या दृष्टीने दोन प्रकारची गति होते. **वाताच्या**

**संचय व प्रकोपाची कारणे**—लघु व रूक्ष द्रव्यामुळे वाताचा संचय होतो. त्याच प्रकारच्या आहाराने देखील वाताचा संचय होतो; लघु रूक्षादिगुण वाढतील असा आहार घेतला किंवा तशी औषधिद्रव्ये सेवन केली तर वायूचा संचय होतो. शिवाय उष्ण गुणयुक्त रूक्षादिगुण झाले म्हणजेही वाताचा संचय होतो. रूक्षादिगुण, शीतगुणयुक्त झाले म्हणजे वाताचा प्रकोप होतो. धातूंचा क्षय झाल्यामुळे, वाताचा मार्ग आवृत झाल्यामुळे आणि गतीला अडथळा आल्यामुळेही वाताचा प्रकोप होतो. रूक्ष, लघु, शीत ह्या गुणांच्या व वमन, विरेचन, आस्थापन शिरोविरेचन ह्यांच्या अतियोगामुळे अतिव्यायाम केल्यामुळे, शरिरातील वेग रोकल्यामुळे, खाल्ल्यामुळे, मार लागल्यामुळे अतिसंभोगामुळे, उद्वेग व शोक ह्यांच्यामुळे, रक्त अतिशय प्रमाणात लंघनामुळे, अति जागरणामुळे, शरीर वेडेवाकडे नेहमी ठेवण्यामुळेही वायूचा प्रकोप होतो. **आणखी प्रकोपक कारणे**—बलवान मनुष्याशी झोंबी घेणे. अतिव्यायाम, अति अध्ययन, उंचावरून पडणे, उड्या मारीत मारीत जाणे, खूप धावणे, जोराने दाबणे, अतिलंघन, अतिशय पोहणे, नदी वगैरे तरून जाणे, रात्री जागरण, मोठे ओझे वाहून नेणे, हत्ती, घोडे यावरून अति प्रवास आणि पायाने अति चालणे, तिखट, तुरट, कडू, थंड, वाळलेल्या भाज्या, वाळलेले मांस, वर्टी, रानकोद्र, वऱ्याचे तांदूळ इत्यादी तृणधान्ये मूग, मसूर, तूर, वाटाणे, पावटे हे पदार्थ अवेळी कमी जास्त खाणे, जेवणावर जेवण, वात, मूत्र, पुरीष शुक्र, ओकारी, शिंक, ढेकर, अश्रु यांचे वेग अडवले तरीही वायु प्रकुपित होतो. वर्षाऋतूत व दिवस रात्र आणि भोजन ह्यांच्या शेवटच्या कालात किंवा अन्य दोषांनी स्रोतसे भरली असता, वाताला त्यांचे आवरण होऊन बलवान वात प्रकुपित होतो. **वातवृद्धिलक्षण**—कर्कश बोलणे, शरीर किडकिडीत, काळे असणे. अवयवात स्फुरण, मळ कडक, निद्रानाशक आणि उष्ण पदार्थांची इच्छा, संज्ञा, बल, इन्द्रिये यांचा नाश, अस्थिशूल, मज्जेचा शोष, मळाचा अवरोध, पोट फुगणे, पोटात गुडगुड, विचार नीट न करता येणे, दीनता, भय, शोक, बडबड, इ० पीडा होतात. गर्भिणीच्या शरिरात प्रकुपित वात गर्भाला क्रियाहीन, बहिरा, मुका, नाकात बोलणारा, अडखळत बोलणारा, लंगडा, कुबडा, बुटका, एखादा अवयव कमी किंवा अधिक असणारा किंवा इतर वातविकारग्रस्त करतो. **वातक्षयाची कारणे**— वातगुणांच्या विपरीत गुणांची, स्निग्ध, गुरु, उष्ण इत्यादींची वाढ झाल्याने वाताचा क्षय होतो. **वातक्षयाची लक्षणे**—तोंडाला पाणी सुटणे, घशाशी येणे, रुचीचा नाश, संज्ञा नीट न कळणे, हालचाली मंद, अंग गळणे, अवेळी कमीजास्त भूक लागणे, अशी लक्षणे होतात व कफाच्या वृद्धीमुळे होणाऱ्या रोगांची उत्पत्ति होते. वातक्षयामध्ये वातवर्धक जे जे अन्नपान आहे त्याची इच्छा होते. जसे जव, मूग, वाटाणे, रूक्ष, हलके, तुरट, तिखट, कडू अशा पदार्थांची इच्छा. **सामवायुलक्षण**—पोटदुखी, झापड, स्तब्धता, अंगाचा ओलावा, जडपणा, स्निग्धता, रुचि नसणे, आळस, थंडावा, सूज, अग्निनाश, तिखट, रूक्ष, द्रव्यांची इच्छा आणि अशा द्रव्यांच्या सेवनाने बरे वाटणे. **निरामवात**— झापड इत्यादी सामवाताच्या चिन्हांच्या विपरीत चिन्हे असतात तेव्हा निराम वात समजावा. आमाच्या विपरीत पक्वत्व. **अवयवगत वात लक्षणे—त्वगाश्रित वायूची लक्षणे**—वर्णाचा बिघाड, स्फुरण, रूक्षता, स्पर्शनाश, चिमचिम वेदना, टोचणी, त्वचा फाटणे, त्वचा फुटणे. **रक्तगत वायु लक्षणे**—अतिशय दाह, वेदना, वर्णाचा बिघाड, कृशता, अरुचि हातापायांवर खवडे, जेवण झाल्यानंतर अंग ताठणे, अन्नावर अनिच्छा, व्रण, सुयांनी टोचल्याप्रमाणे वेदना, स्पर्शाबद्दल द्वेष, स्पर्श न कळणे, पित्तविकार आणि भ्रम. **मांसाश्रित वायु लक्षण**—शूलयुक्त गाठी होणे. **मेदोगत वायुलक्षण**—मन्दवेदना न पिकणाऱ्या गाठी होणे. **मांसमेदोगत वायु लक्षण**—अंग जड, दांडक्याने किंवा बुक्की मारल्यासारखी पीडा, थकवा, वेदना, भ्रम, कठिण ग्रंथी आणि श्रम. **अस्थिगत वायु लक्षणे**—हाडे सुकणे, ती फोडल्याप्रमाणे पीडा होणे. त्यात शूल, संपूर्ण पायात तीव्र शूल, संधींमध्ये व हाडात शूल, तीव्र बलक्षय. **मज्जगत वायु लक्षण**—मज्जा सुकणे, हाडे पोकळ होणे, झोप न येणे, वेदना, हालचाल बंद होणे. **मज्जास्थिगत वायु**

**लक्षणे**—हाडे व पेरी फुटल्याप्रमाणे वाटणे, संधींमध्ये शूल, मांसक्षय व बलक्षय, निद्रानाश व एकसारखी पीडा. **शुक्रगत वायुलक्षणे**—गाठाळ आणि विकृत वर्णयुक्त शुक्र. शुक्राचे अतिशीघ्र-पतन किंवा अतिमंदप्रवृत्ति, गर्भाचे शीघ्रपतन, गर्भ अडणे, गर्भात विकृति होणे. **आमाशयगत वायु लक्षणे**— हृदय, नाभीत, दोन्ही कुशी, पोट ह्या ठिकाणी वेदना, तहान ढेकरा येणे, शूलयुक्त व वमनातिसारयुक्त अजीर्ण, खोकला, श्वास, घसा आणि तोंड सुकणे, नाभीच्या वरचे रोग, ओकारी, नाकातोंडातून रक्त जाणे, विचारशक्ति विकृत होणे, मूर्च्छा, हृदय जखडल्याप्रमाणे वाटणे, फासळ्यांमध्ये वेदना. **पक्वाशयस्थ वायु लक्षणे**— आतडीमध्ये कुरकुरणे, शूल, गुडगुडणे, लघवीला व शौचाला कष्टाने होणे, माकडहाडात दुखणे, कान इ० इन्द्रियांच्या कार्यांचा नाश होणे. मूतखडा, वृषणवृद्धि, मूळव्याध, शरिराच्या खालच्या भागाचे कष्टदायक उपद्रव. **शिरागत वायु लक्षण**—शिरांचे आकुंचन, शिरापूर्ण भरणे, शूल, शिरा रिकाम्या व किंवा फुगलेल्या होतात. **स्नायुगत वायु लक्षणे**—स्नायु ताठ होणे, कंप, शूल, झटके येणे, गृध्रसी, शरिराला ताठ किंवा कुबडेपणा. **संधीगत वायु लक्षणे**—आकुंचन प्रसरण इत्यादी क्रिया होत नाहीत. सान्ध्यांना सूज, त्यात शूल ज्वर व जांभया येतात. सुजेचा स्पर्श वात भरलेल्या पखालीच्या स्पर्शाप्रमाणे, अवयव पसरताना व आखुड करताना वेदना. **फासळ्यात वायु दुष्ट झाला तर**—फासळ्यात शूल; **गुदस्थित वायु**—मळ फुटीर, मळ, मूत्र आणि वात ह्यांचा अवरोध, शूल, पोटफुगी, मूतखडा आणि मूत्रात रेव पडणे. **उरस्थ वायु**—छातीत शूल होतो. **कोठ्यात रुध्द-वात** मूळव्याधीमुळे रुद्ध झाल्यास अग्निमांद्य करतो, **मेदाने रुद्ध वायु** अग्निवृद्धि करतो, **प्राणवह-स्रोतसात रुध्द झालेला वात**—उच्छ्वास व निःश्वास ह्यांचा रोध करतो. किंवा मरण येते. **शरिराच्या निरनिराळ्या अवयवात गेलेला वात**—त्या त्या अवयवाला अनुसरून अनेक रोग करतो. **आवृत मार्ग झालेला वात** बाह्य सिरांमध्ये येऊन फुटीर सूज करतो. एक धातुगत वाताचे उपचार केले नाहीत तर तो सर्व धातुगत होतो. **सर्वदेहाश्रित वात**—अंग जखडणे, झटके येणे, स्पर्शज्ञान नष्ट करणे, सूज व शूल सान्धे आखडणे आणि कंप हे विकार करतो. उन्मार्गगामी वात जेव्हा गर्भाच्या रसवह स्रोतसात जातो तेव्हा स्रोतसे सुकवतो व गर्भास वातरोगी व विकल गात्र करतो. प्रकुपित झालेला वायु ऐंशी वातरोग करतो. सगळे रोग उत्पन्न होण्यास वाताशिवाय दुसरे कारण नाही. हातपाय तुटल्याने, मर्मांवर आघात झाल्याने अतिशय रक्तस्राव झाल्याने, विकृत झालेला वायु मरण आणतो. **वाताची शुभ लक्षणे**—मंद, शीत, सुखद, सुगन्धी असा वायु शुभ होय, **वाताची अशुभ लक्षणे**—खरखरित, नको असलेल्या वासाचा, उष्ण असा वायु अशुभ होय. **वाताच्या शमनाचा उपाय**—वातगुणांच्या विरुद्ध गुण असलेल्या द्रव्यांनी वाताचे शमन होते, तसेच स्नेहन, शेकणे, अभ्यंग, बस्ति, स्निग्धरेचक, डोक्याला स्नेह मर्दन करणे, शिरोबस्ती, मऊ शय्या, अग्नीचा शेक, ब्रह्मचर्य इत्यादी उपायही हितावह होत. हातपायां-सारख्या शरिराच्या शाखागत वातामध्ये बस्ती विशेष उपयुक्त. आमाशयगत वातात प्रथम वान्ती करवणे योग्य. पक्वाशयगत वातात स्निग्ध रेचक द्यावे तसेच मलहारक बस्ती सुद्धा उपयुक्त; आमाशयगत वातात प्रथम रूक्ष द्रव्यांनी शेकावे. त्वचा, मांस, रक्त, शिरा यांच्यातील वातामध्ये अभ्यंग, मर्दन, लेप, पोटीस स्नेहपान आणि रक्त-स्राव हे उपचार करावे. स्नायुसन्धि आणि अस्थि-गत वातात स्निग्ध पोटीस, डाग देणे बन्धन आणि मर्दन हितावह होते. स्त्रियांना वाताचा उपद्रव होत असेल तर बस्तीचा उपचार श्रेष्ठ, अतिबलवान वातात रसायन चिकित्सा उपयुक्त आहे.

**–कण्टक**–पु., रोग० **अशीतिवातविकारेष्वेकः, चरके तु अनुक्तः, अत्रोक्तो गणनायाम्** (कासू. २५.१९-२१) **गुल्फसन्धिसंश्रितो वातरोगः, खुडकावातपर्यायः, खडुलकाश्रितत्वात्,** (मधुकोश, मानि.) **सम्प्राप्तिः-लक्षणं च-विषम-स्थाने निक्षिप्ते पादे गुल्फसन्धि-श्रितः-खडुलकाश्रितः-वातः प्रकोपमापद्यते। अथवा श्रमकुपितः वातः गुल्फसन्धिमाश्रित्य गुल्फवेदनां जनयति पादेऽपि रुजाम्** (सुनि. १.७९; असंनि. १५) **चिकित्सा–तत्र वातव्याधिचिकित्सितं**

कुर्यात् (सुचि.५.२३) स्वेदोऽयं रोगः (चसू. १४.२३) (अहसू. १७.२६) सिराव्यधं कुर्यात् (सुचि. ५.२३) क्षिप्रमर्मणो द्व्यङ्गुले उपरि सिरां विध्येत् (अहसू. २७.१६)

वातकंटक हा एक रोग. ऐंशी वात विकारातील एक. घोट्याच्या सांध्यात होणारा वातरोग. **संप्राप्ति व लक्षण**— खाच खळगे असलेल्या जमिनीवर पाय वाकडा पडला तर किंवा श्रमाने वातप्रकोप होऊन घोट्यात व पायात ही वेदना करतो. **उपचार**— वातव्याधीचे उपचार करावे. ह्यात घाम आणणारे उपचार करण्यासारखे असतात. हा **त्वरित होणारा रोग आहे.** आंगठा व बोट यांमधल्या क्षिप्र-मर्माच्या वरच्या जागेवरची शीर तोडावी.

**–कलाकलीय**–वि., अध्यायसंज्ञा० वातकलाकल-शब्दमधिकृत्य कृतोऽध्यायः ( चसू. १२.१ )

अध्यायाचे नाव. वाताबद्दलची माहिती यात आहे. वाताचे गुणदोष यात आहेत.

**–कुण्डलिका**–स्त्री., रोग० त्रयोदशमूत्राघातेषु एकः मूत्ररोगः (सुसू. २३.८; चसि. ९.४०) सम्प्राप्तिः– रौक्ष्याद्वेगविघाताद्वा मूत्राशयस्थितः कुण्डलीकृतो विगुणो वायुः शनैः शनैः अल्पाल्पं मूत्रं सृजति ( सुउ. ५८.६ ) लक्षणम्–मूत्रावरोधः बस्तिस्थाने तीव्रशूलं गौरवं भग्नाकारवेदना मूत्रविट्सङ्गादिश्च भवति ( चसि. ९.४०; असंनि. ९ ) याप्यरोगो-ऽयम्, चिकित्सा–कषायकल्कसर्पींषि भक्ष्यान्लेहान् पयांसि च क्षारमद्यासवस्वेदान् उत्तरबस्तिं च कारयेत् । सर्वेऽपि मूत्राघाताः प्रायशो वातजन्याः; तस्मात् वातघ्नो विधिरत्र हितः ( ड. सुउ. ५८.२७-२८ )

तेरा मूत्राघातविकारांपैकी एक. **संप्राप्ति**— शरिरात रूक्षता आल्याने, मलमूत्राच्या वेगांचा अवरोध केल्याने वायु प्रकुपित होऊन ऊर्ध्वगति होतो व हळूहळू थोडे थोडे लघ्वीला करतो. **लक्षण**—मूत्राचा अवरोध, बस्तीत तीव्र शूल, जडपणा, फोडल्याप्रमाणे वेदना, लघ्वी विष्ठा यांचा संचय होतो. हा रोग औषधोपचार व पथ्य असे तोपर्यंत बरा असतो. **उपचार**—काढा, चटणी, तूप, खाद्यपदार्थ, चाटणे, सिद्ध दूध, क्षार, दारू, आसव, शेक व मूत्राशयात बस्ति द्यावा. सर्वच मूत्राघात वातज म्हणून वातनाशक उपचार असावेत.

**–खुडता**–स्त्री., रोग० अशीतिवातविकारेष्वेकः ( असंसू. २० )

ऐंशी वातविकारांपैकी एक. घोट्यात वाताने वेदना होणे.

**–खुड्डुता**–स्त्री., वातरोग० वातखुड्डुता, अशीति-वातविकारेष्वेकः, 'चालुक' इति प्रसिद्धः ( चसू. २०.११ )

ऐंशी वातरोगातील एक.

**–गजाङ्कुश**–पु., पारदयोग० पारदलोहगंधकताल-माक्षिकादिसाधितोऽयं वातविकारघ्नः ( र. २१.१५६-१५७

पाऱ्याचा एक योग. लोहगंधकादियुक्त वातरोगनाशक.

**–गुल्फ**–पु., वातरोग० अशीतिवातरोगेष्वेकः, गुल्फसन्धिस्थः वातप्रकोपः ( कासू. २७.१९-२० )

ऐंशी वातरोगांपैकी एक. घोट्याच्या सांध्यात वाताचा प्रकोप.

**–ग्रह**–पु., लक्षण० वातावरोधः, गुदस्थितकुपित-वातलक्षणम् ( चचि. २८.२६ )

गुदस्थित वाताचा अवरोध. तज्जन्यकुपित वात-लक्षणे.

**–(घ्न)**–वि., वातनाशकम्, यथाऽन्नम् ( असंसू. ५ )

वातनाशक. जसे अन्न.

**–घ्नी**–स्त्री., वनस्पति० शालिपर्णी ( रा. ४.११४; पृ. २३ ) सालवण.

अश्वगन्धा ( रा. ४.४०१; पृ. ६२ ) आस्कंद. सिगृडी ( रापरि. ४३१; पृ. ३३७ )

कठीण पानांची झुबकेदार फुलांची वनस्पती.

**–घ्नगण**–पु., गण० वातोद्भवपीडानिवारकः द्रव्य-समूहः ( सुउ. २१.२८ ) वातघ्नानि द्रव्याणि– शालिपर्णी–पृश्निपर्णी–बृहती––कण्टकारिका–बला-श्वदंष्ट्रा–बिल्व–पाठा–नागरधान्यकानि ( ड. सुउ. ४०,१४७ )

वाताची पीडा नाशक औषधांचा गट. सालवण, पिठवण, डोरली, रिंगणी, चिकणा, गोखरू, बेल, पहाडमूळ, सुंठ, धणे.

**–घ्नतैल**–न., वातघ्नद्रव्यैः सिद्धं तैलम् ( अहसू. ३.१० )

वातनाशक द्रव्यांनी तयार केलेले एक तेल.

**–जित्पत्र**–न., वातशमनपत्रम्, यथा एरण्डपत्रादि ( अहसू. १७.५ )

वातशामक पान, जसे एरंडाचे पान इ०

**–तर्ष**–पु., रोग० वातजतृष्णा ( चक. १२.१२ )
वातज तहान.

**–धामन्**–न., वातस्थानम्, यथा पक्वाशयादि ( असंसू. २८ )
वाताचे स्थान; जसे पक्वाशय, पक्वाधान इत्यादी.

**–निग्रह**–पु., वातवेगस्य नियमनम् ( चसू. ७.१२ )
वाताच्या वेगाचे नियमन.

**–निरसन**–न., वातनिःसरणम् ( सुशा. ६.२५ )
वात सरणे, वात निघणे.

**–निरोध**–पु., लक्षण० वाताऽप्रवर्तनम्, अधोवाताऽप्रवर्तनम्, अपानवायोरप्रवृत्तिः ( सुउ. ५६.८ )
वात न सरणे, अडणे, खालून वाताची प्रवृत्ति न होणे, न सरणे. अपान वायूची प्रवृत्ति न होणे.

**–पर्याय**–पु., नेत्ररोग० अस्मिन् प्रदुष्टः वातः कदाचित्सूक्ष्मद्वये अक्षिणि कदाचित् कदाचिद्भुवि पर्यायेण रुजः करोति ( सुउ. ६.२५ ) वातपर्याये तर्पणं योज्यम् ( अहृसू. २४.२ )
यात दुष्ट वात केव्हा दोन्ही पापण्यात, केव्हा भुवईत, केव्हा डोळ्यात वेदना करतो. उपचार– डोळा औषधी तेलाने भरणे.

**–पित्ताधिक**–वि., वातपित्तेऽधिके यस्मिन् सः (नरः) ( चसू. १३.१९ )
वातपित्त हे अधिक असलेला ( मनुष्य ).

**–पूर्णकोष्ठता**–स्त्री., लक्षण० वातपूर्णोरस्कता इदमपस्तम्भ–मर्मविद्धलक्षणम् ( सुशा. ६.२५ )
छातीमध्ये वायु भरणे. अपस्तंभ–श्वासनलिका विच्छिन्न झाली तर हे लक्षण होते.

**–पूर्णदृतिस्पर्श**–पु.,लक्षण० दृतिश्चर्मकोशः वातपूरितचर्मकोशवत् स्पर्शः ( चचि. २८.३७;असंनि. १५ )
दृति म्हणजे चामड्याची पिशवी, वात भरलेल्या चामड्याच्या पिशवीच्या होणाऱ्या स्पर्शासारखा स्पर्श.

**–पोथ**–पु., वनस्पति० पलाशः ( चचि. ३.२५८; ध. ५.१६१; पृ. २०३ ) पळस.

**(वात)–प्रकृति**–स्त्री., दोषप्रकृति० ( चवि. ६.१३ )
तनुरूक्षस्तब्धाल्पाङ्गदन्तनखरोमनेत्रस्वरउद्बद्धपिण्डिकः शीतद्वेषी, सशब्दसन्धिगामी, शीघ्रारम्भक्षोभग्रहणविस्मरणश्चलधृतिमतिगतिदृष्टिस्वभावसौहार्दः, स्तेनोऽनार्यो मत्सर्यजितेन्द्रियः, प्रियगान्धर्वेतिहासविलासकलहमृगयोद्यानयात्रः, स्निग्धोष्णमधुराम्ललवणान्नपानकाङ्क्षोपशयश्च भवति ( असंशा. ८.९ ) स्फुटितधूसरकेशगात्रो बहुप्रलाप्यल्पवित्तजीवितनिद्रः सन्नसक्तचलजर्जरशब्दो नास्तिको बह्वशनः कृशदीर्घाकृतिर्न च कान्तादयिताबहुप्रजो न दृढः, नेत्राणि–खरधूसराणि वृत्तान्यचारूणि मृतोपमानि, सुप्ते सति तानि उन्मीलितानीव भवन्ति । श्वशृगालोष्ट्रगृध्राखुसदृशवृत्तिः, सुप्तः शैलद्रुमगगनानि पश्येत् । गगने च याति ( अहृशा. ३.८५-८९ ) प्रजागरूको दुर्भगः स्फुटितकरचरणोऽल्परूक्षश्मश्रुनखकेशो हिंसाशीलो दन्तखादी कृतघ्नो द्रुतगतिः ( सुशा. ४.६४-६७ ) उष्ट्रो वातप्रकृतिः पशुः ( सुशा. ४.६७ ) ते एते वातप्रकृतयो लघुत्वात्–लघुचपलगतिचेष्टाऽऽहारव्याहाराः, चलत्वात्–अनवस्थितसंध्यक्षिभ्रूहन्वोष्ठजिह्वाशिरःस्कन्धपाणिपादाः, बहुत्वात्–बहुप्रलापकण्डरासिराप्रतानाः, शीघ्रत्वात्–शीघ्रसमारम्भक्षोभविकाराः, शीघ्रत्रासरागविरागाः, श्रुतग्राहिणोऽल्पस्मृतयश्च, शैत्यात्– शीताऽसहिष्णवः प्रततशीतकोद्वेपकस्तम्भाः, पारुष्यात्–परुषकेशश्मश्रुरोमनखदशनवदनपाणिपादाः, वैशद्यात्–स्फुटिताङ्गावयवाः सततसंधिशब्दगामिनश्च ( चवि. ८.९८ )

**वातप्रकृति**– दोष प्रकृति. लघुत्वामुळे गति, हालचाल, आहार, बोलणे ही सर्व हलकी व चपल असतात. चलत्वामुळे संधि, डोळे, भुवई, हनुवटी, ओठ, जीभ, डोके, खांदे, पाय, हात हे चंचल कंपयुक्त. बहुत्व–पुष्कळ प्रमाण असल्यामुळे तो फार बडबड करतो. कंडरा, शिरा स्नायूंचे धागे फार स्पष्ट दिसतात. शीघ्रत्व त्वरा ( शीघ्र गतिमत्व ) असल्यामुळे मनात येतांच साधक बाधक विचारहि न करिता ताबडतोब कार्याला आरंभ, झटकन क्षोभ, चटकन विकार, शीघ्रतेने त्रस्तता, आसक्ति व विरक्ति ही उत्पन्न होतात. ऐकलेले लवकर ग्रहण होते. स्मरण शक्ती थोडी, शीतत्वामुळ थंडी सहन होत नाही.
शरिरांत थंड अशा लहरी संचार करीत असतात. कंप, अवयव ताठरल्यासारखे असतात. खरखरीतपणामुळे केस, दाढी, मिशा, नखे, दात, तोंड, हात, पाय हे रखरखीत खरखरीत फुटीर असतात. पृथक्करणधर्मामुळे—अवयव फुटलेले, विलग असतात व चालताना सांधे सतत कटकट वाजतात.

अंगे, दात, नख, केश, डोळे स्वर हे बारीक रूक्ष अडखळणारे व लहान असतात. शरिराचे काही भाग वर उचलून आलेले बांधीव गोळ्यासारखे असतात, त्याचे निर्णय, बुद्धि गति, दृष्टी, स्वभाव, मैत्री, ही सर्व अस्थिर-चंचल असतात. तो चोर, असभ्य, मत्सरी, मनावर ताबा नसलेला असतो. गायन, इतिहास, विलास, कलह, शिकार, बागबगीचे व प्रवास करणे, हे त्याला प्रिय असते. स्निग्ध, उष्ण, गोड, आंबट, खारट, अन्नपान यांची त्याला इच्छा असते व त्याचा आरोग्यरक्षण व वर्धनास उपयोग होतो. अवयव, केस, करडे, व फुटीर, फार बडबडतो, पैसा, झोप व आयुष्य थोडे. त्याचा शब्द खोल, अडखळणारा, कापरा, चंचल असतो. पुष्कळ खातो. नास्तीक, कृश व उंच असतो; बायकोचा आवडता नसतो व पुष्कळ संतति नसते. तो बळकट नसतो. डोळे खरखरीत मळकट वाटोळे बेढब व मेलेल्या माणसासारखे निस्तेज व झोपेत सुद्धा अर्धवट उघडे असतात. त्याचा स्वभाव कुत्रा, कोल्हा, ऊंट, गिधाड, उंदीर यांच्यासारखा असतो. झोपेत डोंगर, वृक्ष आकाश पहातो व त्यात संचार करतो. दुर्भागी, कृतघ्न, दात खाणारा, हिंसेची आवड असणारा व लवकर चालणारा असतो.

**–बलास**–पु., **रोग० वातस्यावरणेन बलमस्त्यस्मिन् शोणिते इति** (चक्र.) **वातरक्तम्**, (चचि. २९.११) वातरक्त. ज्याच्या रक्तात वाताच्या आवरणाने बल असते तो रोग.

**–बलासक**–पु., **रोग० ज्वरभेदः, तल्लक्षणं–नित्यं मंदज्वरः रूक्षः शूनकः स्तब्धाङ्गः श्लेष्मभूयिष्ठः व्याधितो भवति** (मानि.) **द्र० ' ज्वर '** (चचि. १, (३) ३५; सुउ. ३९.५८)
**एक ज्वर. लक्षणे**— नेहमी मंद ज्वर, रूक्षता, सूज. अंग जखडलेले असते, हा कफभूयिष्ठ असतो.

**–बस्ति**–पु., मूत्ररोग० (चसि. ९.३७) **मूत्राघातेष्वेकः, सम्प्राप्तिः लक्षणं च–मूत्रवेगविधारणाद्बस्तिगतः प्रकुपितः वायुः बस्तिद्वारं निरुणद्धि। तेन मूत्रसङ्गः बस्तिकुक्षिनिपीडनं कण्डूश्च भवति** (सुउ. ५८.९-१०) **अधिकवायुकोपात् कदाचित् बस्तिं स्वस्थानात्प्रच्याव्य गर्भमिवोद्वृत्तं स्थूलं परिप्लुतं च कुरुते। तत्र शूलं स्पन्दनं दाहः उद्वेष्टनं बिन्दुशः मूत्रस्रवणं च। बस्तौ पीडिते सति धारया मूत्रप्रवृत्तिः** (इन्दु असंनि. ९.१९-२०)
**साध्यासाध्यता–उभयविधोऽपि वातबस्तिः कृच्छ्रसाध्यः, तत्र द्वितीयो वातप्रबलः कृच्छ्रसाध्यतरः** (असंनि. ९.२१)
मूत्राघाताचा एक प्रकार. **संप्राप्ति व लक्षणे**– लघ्वीचा वेग अडवण्याच्या सवयीने बस्तीतील वात प्रकुपित होऊन बस्तीचे द्वार बंद करतो, त्याने मूत्र बंद होते, बस्ति व कुक्षीत पीडा व खाज होते. वात फार कोपला तर बस्तीला स्वतःच्या स्थानातून भ्रष्ट करून गर्भासारखा करतो, मोठा होतो व अवकाश व्यापतो त्यामुळे शूल, स्पंदन, दाह, वळणे, थेंबथेंब लघ्वी होणे व बस्ति दाबला तर मूत्राची धार पडणे ही लक्षणे होतात. **साध्यासाध्यत्व**— वरील दोन्ही कष्टसाध्य. त्यात दुसरा वातप्रबल प्रकार अधिक कष्टसाध्य.

**–बुद्बुद**–पु., **वारिबिम्बुकी** (वै. श. सि.) **वातकृतो बुद्बुदः, बस्तिप्रदानात्पूर्वं बस्तियन्त्राद्वातस्य बुद्बुदं निःसारयेत्** (असंसू. २८)
बुडबुडा (पाण्याचा). बस्ति देताना प्रथम बस्तियंत्रातून येणारा वाताचा बुडबुडा. (हा काढून टाकावा.)

**–मूल**–न., **वातस्य मूलमादिकारणम्** (चसू. २०.१३) वाताचे मूळ कारण.

**–यन्त्र**–न., **वातसञ्चालकं यन्त्रम्, व्यजनम्** (चचि. २४.१५८)
वारा घालण्याचे यंत्र. वाताची हालचाल करणारे. पंखा.

**–रक्त**–न., **वातमिश्रितं रक्तम्, यथा वातरक्तवहसिरालक्षणम्, श्यावारुणाः प्रस्पन्दिन्यः सूक्ष्माः क्षणपूर्णरिक्ता वातरक्तं वहन्ति** (असंशा. ६)
वातमिश्रित रक्त. उदाहरण– वातवह शिरांचे लक्षण– काळसर, तांबुस रंगाच्या स्पंदन युक्त सूक्ष्म, क्षणभरात रिकाम्या होऊन भरणाऱ्या शिरा वातरक्ताचे वहन करतात.
**रोग० वातशोणितम्** (चचि. २९.१; सुसू. २४.९)
**वातबलासः, वातबलाशः** (चचि. २९.११)
**वातास्रम्** (अहसू. ११.९) **खुडः, आढ्यरोगः, आढ्यवातश्च इत्यपि पर्यायाः** (सुचि. ५.५)
**वातरक्ताभ्यां जनितः व्याधिः** (चचि. २९.१)
**रक्तादोषजविकारेष्वेकः** (चसू. २४.१२; सुसू. २४.९) **विवृद्धो वायुः वृद्धेन रक्तेन पथि**

आवृतो रक्तं सन्दूषयेत् ( चचि. २९.१०-११ ) तदा तोदस्फुरणभेदगुरुत्वसुप्तिक्षतादि–लक्षणान्वितं पीडनं हस्तपादाद्यङ्गुलिसन्धिषु भवति ( असंनि. १६ ) दोषप्राधान्याद्वातरक्त इति व्यपदेशो न तु रक्तवात इति ( मधुकोष. मानि. ) विशेषस्थानम्–करौ पादौ अङ्गुल्यः सर्वसन्धयश्च ( चचि. २९.१२ ) हेतुः सम्प्राप्तिश्च–लवणरसस्यातियोगेन जायमानेषु विकारेष्वेकः ( चसू. २६.४३(३) ) प्रायशः स्थूलः सुखी सुकुमारो मिथ्याहारविहारी च पुरुषो वातरक्तस्य विषयः ( सुचि. ५.५ ) लवणाम्लकटुक्षारादि–दिवास्वप्नप्रजागरान्तैः कारणैः मिष्टान्नसुखिभोजिनां सुकुमाराणां चङ्क्रमणरहितानां वातशोणितं कुप्यति ( चचि. २९.५-१० ) रोगाध्वप्रमदामद्यव्यायामैश्चाऽतिपीडनात् ( सुनि. १.४०-४१ ) उक्तेन निमित्तेन तथा हस्त्यश्वोष्ट्रपादातिगमनेन च वातप्रकोपनिमित्तेन विदाह्यन्नभक्षणेन रक्तदुष्टिनिमित्तेन चाखिलं दुष्टं रक्तं पादयोश्चीयते। पश्चादाखुविषमिव देहमनुसर्पति ( सुचि. ५.४ ) पूर्वं विशेषायानयानाद्यैः प्रलम्बौ हस्तौ पादौ दुष्टं रक्तं धावति ( असंनि. १६ ) संख्यासम्प्राप्तिः–वातपित्तरक्तकफत्रिदोषाधिक्यैः वातरक्तं पञ्चविधम् ( मानि ) विधिसम्प्राप्तिः–द्विविधं वातरक्तं गम्भीरमुत्तानं च ( चसू. १९.३ ) त्वङ्मांसाश्रयं वातशोणितमुत्तानं ज्ञेयम् ( चचि. २९.१९ ) गम्भीरधात्वाश्रयं वातशोणितं गंभीरं ज्ञेयम् ( चचि. २९.१९ ) उत्तानमेव कालान्तरेण सर्वान्धातूनभिद्रवद्गम्भीरं जायते ( असंनि. १६ ) गम्भीरं वातरक्तमवगाढमित्येके भाषन्ते ( सुचि. ५.३ ) लक्षणम्–तत्र उत्तानस्य लक्षणम्–त्वक्कण्ड्वादिसंयुताऽऽताम्रा श्यावलोहिता दाहतोदस्फुरणाकुञ्चनयुक्ता भवति ( चचि. २९.२०; असंनि. १६ ) उत्तानं कुष्ठवद्भूत्वा कालान्तरेणावगाढीभवति (सुचि. ५.३) अवगाढस्य गम्भीरस्य वा लक्षणम्–गम्भीरे वातशोणितेऽन्तर्भृशार्तिमाँस्तब्धः कठिनः श्यावस्ताम्रो दाहतोदस्फुरणपाकवान् श्वयथुर्भवति। रुग्दाहान्वितो वायुः सन्ध्यस्थिमज्जसु छिन्दन्निव चरति वेगवाँश्च सञ्चन्तो वक्रीकुर्वञ्छरीरे सर्वतश्चरन्खञ्जं पङ्गुं च करोति ( चचि. २९.२०–२३; असंनि. ६ ) पूर्वरूपम्–प्राग्रूपे शिथिलौ स्विन्नौ शीतलौ सविपर्ययौ, वैवर्ण्यतोदसुप्तत्वगुरुत्वौपसमन्वितौ, पादौ भवेताम् ( सुनि. १.४७ ) तोदो दाहः कण्डूः शोफः स्तम्भः स्तब्धता त्वक्परुषता शिरास्नायुधमनीनां स्पन्दनमूरुदुर्बलता पाणिपादतलाङ्गुलिगुल्फमणिबन्धप्रभृतिषु चावयवेषु अकस्माच्छयावरक्तमण्डलानामुत्पत्तिः ( सुचि. ५.४ ) कार्ष्ण्यं स्पर्शाज्ञत्वं क्षते रुक् च भवति, इति वातासृक्पूर्वं लक्षणम् ( चचि. २९. १६-१८ ) वाताधिकवातरक्तलक्षणम्–स्पर्शोद्विग्नौ तोदभेदप्रशोषस्वापोपेतौ पादौ भवतः ( सुनि. १.४५ ) सिरायां शूलस्फुरणतोदनं शोफस्य रूक्षत्वकृष्णत्वश्यावतावृद्धिहानयो धमन्यङ्गुलिसन्धीनां सङ्कोचः, अङ्गग्रहोऽतिरुक्शीतद्वेषः शीताऽनुपशयः स्तम्भो वेपथुश्च ( चचि. २९.२५-२६; असंनि. १६ ) पित्ताधिकवातरक्तलक्षणम्–पित्तासृग्भ्यामुग्रदाहौ अत्यर्थोष्णौ रक्तशोफौ मृदू च पादौ भवेताम् ( सुनि. १.४५ ) विदाहः सम्मोहः स्वेदो मूर्च्छामदस्तृष्णा स्पर्शाक्षमत्वं रुग्रागः शोफे भृशोष्मता पाकश्च भवति ( असंनि. १६; चचि. २९.२७-२८ ) रक्ताधिकवातरक्तलक्षणम्–अतिरुक्तोदवाँस्ताम्रः कण्डूक्लेदसमन्वितः शोफः। तत्र चिमचिमायनं स्निग्धरूक्षाभ्यामनुपशयत्वं च (असंनि. १६;चचि. २९.२७-२८) कफाधिकवातरक्तलक्षणम्–पादौ कण्डूमन्तौ श्वेतशीतौ सशोफौ पीनस्तब्धौ भवेताम् (सुनि. १.४६) स्तैमित्यं गुरुता सुप्तिः स्निग्धत्वं शीतता मन्दा कण्डूर्मन्दा च रुग्भवति (असंनि. १६;चचि.२९.२९) त्रिदोषजवातरक्तलक्षणम्–सर्वैर्दुष्टे शोणिते दोषाः स्वं स्वं रूपं पादयोर्दर्शयन्ति। हेतुलक्षणसंसर्गाद्विद्याद्द्वन्द्वत्रिदोषजम् ( चचि. २९.२९ ) उपद्रवाः–अस्वप्न–अरोचक–श्वास–मांस–कोथ–शिरो–ग्रह–मूर्च्छा–मद–रुक्–तृष्णा–ज्वर–मोह–प्रवेपक–हिक्का–पाङ्गुल्य–विसर्प–पाक–तोद–भ्रम–क्लम–अङ्गुलिवक्रता–स्फोट–मर्मग्रह–अर्बुदरूपा उपद्रवा भवन्ति ( चचि. २९.३२ ) साध्यत्वादि–एकदोषानुगं नवं निरुपद्रवं वातशोणितं साध्यम् द्विदोषजमकृत्स्नोपद्रवं याप्यम् ( चचि. २९.३०-३४ ) द्विदोषजं नवं याप्यम् ( असंनि. १६ ) संवत्सरोत्थितं याप्यम्। ( सुनि. १.४९-५० ) त्रिदोषजं कृत्स्नोपद्रवमेकेनाऽपि मोहाख्योपद्रवेण युक्तं संप्रस्रावि विवर्णं स्तब्धमर्बुदकृत् सङ्कोचकरमिन्द्रियतापनमसाध्यम् ( चचि. २९.३०-३४; असंनि. १६ ) आजानुस्फुटितं प्रभिन्नं प्रस्रुतम् उपद्रवैर्जुष्टं प्राणमांस-

**क्षयादिभिरसाध्यम्** (सुनि. १.४९-५०) **रिष्टलक्षणम्- मोहमूर्च्छामदानिद्राज्वरान्वितं शिरोग्रहाऽरुचिश्वास- सङ्कोचकोथवत् रिष्टं विद्यात्** ( असंशा. ११.३३ ) **शाखासन्धिषु निविश्य वातो रक्तमार्गं निहत्यान्योन्य- मावार्य वेदनाभिरसून्हरति** ( असंनि. १६ ) **चिकित्सा–बलक्षयमांसक्षयपिपासाज्वरमूर्च्छाश्वास- कासस्तम्भारोचकाविपाकप्रसरणसङ्कोचनैरनुपद्रुतं बलवन्तमात्मवन्तमुपकरणवन्तं चोपक्रमेत** ( सुचि. ५.६ ) **जलौकोभिः वातशोणितिनः स्निग्धस्य बहुशोऽल्पाल्पं रक्तं हरेत् । पालयन्वायुं यथादोषं यथाबलं रक्तमोक्षणं कार्यम्** ( अहृचि. २२.१-२ ) **स्नेहयित्वा स्नेहयुक्तैर्विरेचनैर्विरेचयेत्** ( अहृचि. २२. ५) **बस्तिं च दद्यात्, 'नहि बस्तिसमं किञ्चिद्वातरक्त- चिकित्सितम् ।'** ( अहृचि. २२.१३ ) **उपनाह– परीषेक–प्रदेह–अभ्यञ्जन–अप्रवातगृह–हर्षण–मृदु- गण्डोपधानानि सुखशयनानि मृदुसंवाहनानि च वातरक्ते प्रशस्यन्ते** ( सुचि. ५.१५-१६ ) **'गुग्गुलु- कल्पः उपयुक्तः'** (सुचि. ५.४५) **तत्र अपथ्यम्– व्यायाम–मैथुन–कोप–उष्णाम्ल–लवणाशन–दिवा- स्वप्न–अभिष्यंद्यन्न–गुर्वन्नानि विवर्जयेत्** ( सुचि. ५.१७ )

**वातरक्त रोग**–वातशोणित, वात बलास, वात- बलाश, वातास्र, खुड, आढ्यरोग, आढ्यवात इतकी याची नावे आहेत. वात आणि रक्त यांच्या दुष्टीने होणारा रोग. रक्तदोषज रोग. वाढलेला वायु वाढ- लेल्या रक्ताने मार्गामध्ये आवृत होतो, त्यामुळे रक्तदुष्टि होते. तेव्हा टोचणी, फूट, स्फुरण, जड- पणा, व्रण, वगैरे पीडा, हात, पाय, करंगळ्या ह्यांच्या सांध्यामध्ये होतात. दोष मुख्य असल्यामुळे याला वातरक्त म्हटले आहे. रक्तवात म्हटले नाही. **विशेषस्थान**- हात पाय, अंगुळ्या, आणि सर्व सन्धी; **कारणे व सम्प्राप्ति**—खारट रसाच्या अतिसेवनाने होणाऱ्या विकारातील एक. बहुधा स्थूल, सुखी, सुकुमार मनुष्य मिथ्या आहार विहार करील तर त्यास वातरक्त होते. खारट, आंबट, तिखट, क्षार इत्यादी व दिवसा झोप, जागरण इ० कारणांनी तसेच मिष्टान्न भोजन करून बसून राहिले तसेच रोग, प्रवास, स्त्री, मद्य, व्यायाम, ह्यांच्यामुळे अतित्रास झाला, तसेच हत्ती, उंट, या वाहनावरून किंवा पायाने अति प्रवास करणे, वातप्रकोपी, विदाही आणि रक्तदुष्टी करणाऱ्या आहारविहारांनी सर्व रक्त दुष्ट होऊन पायामध्ये संचित होते, आणि नंतर उंदराच्या विषाप्रमाणे सर्व शरीरभर हे दुष्ट रक्त विकार करते. हत्ती, उंट यावर बस- ल्याने कारणपरत्वे लांब सोडलेल्या हातापायात दुष्ट रक्त धावते आणि संचित होते. **सम्प्राप्ति संख्या पाच**—वात, पित्त, कफ, रक्त, आणि त्रिदोषज. **विधि संप्राप्ति**—खोल आणि उत्तान असे दोन प्रकार. त्वचा आणि मांस यात विकार करणारे उत्तान. अस्थि मज्जा अशा गंभीर धातूत उत्पन्न होणारे गंभीर किंवा खोल. प्रथम उत्तान असणारे कालान्तराने सर्व खोल धातूत जाऊन नंतर गंभीर होते. त्यालाच अवगाढ वात- रक्त असेही म्हणतात. **उत्तानाचे लक्षण**— खाजयुक्त, तांबडी, काळसर लाल, दाह, टोचणी, स्फुरण, आकुंचनयुक्त त्वचा होते. हे कुष्ठाप्रमाणे प्रथम वरच्या, भागात म्हणजे त्वचा मांसात होऊन कालांतराने, खोल जाते. **गंभीराचे लक्षण**—खोल व अत्यंत वेदनायुक्त, स्थिर, कठीण, काळसर, तांबडा, दाह, टोचणी, स्फुरण युक्त आणि पिकणारी सूज होते. वेदना व दाहयुक्त वायु सन्धि, अस्थि आणि मज्जेमध्ये कापीत जातो. हा वेगवान वायु शेवटी शरिराला ठिकठिकाणी वाकडे करून लंगडा, पांगळा, थोटा करतो. **पूर्वरूप**—पाय थंड, ढिले, घामाने युक्त असे असतात. किंवा याच्या उलट कडक सुकट आणि उष्ण शिवाय टोचणी, स्पर्शाचे ज्ञान न होणे, जड- पणा, आग, आणि वर्ण बिघडणे शिवाय पायात टोचणी ही चिन्हे होतात. खाज, सूज, दडसपणा, हालचाल न होणे, खरखरित त्वचा, सिरा, स्नायु आणि धमनींचे स्पंदन, मांड्यांच्या ठिकाणी अश- क्तता, हात, पाय, तळवे, अंगुळी, घोटा, मनगट इत्यादींच्या ठिकाणी एकदम काळी आणि तांबडी चकंदळे होतात. त्वचा काळी व बधिर होते. जखमे- मध्ये वेदना होतात. **लक्षणे वाताधिक वातरक्त**—स्पर्श सहन न होणे, टोचणी, फूट, पाय सुकणे आणि स्पर्श न कळणे, शिरांमध्ये शूल, टोचणी, स्फुरण, सूज व ती रूक्ष, काळीसावळी, मधूनच वाढणारी व कमी होणारी, धमन्या, अंगुळ्या व सन्धी ही संकुचित होणे, अंग जखडणे, अतिशय पीडा होणे, थंडीचा द्वेष, थंडीने रोग वाढणे, कंप, अंग ताठरणे; **पित्ताधिक वातरक्त**—पित्त आणि

रक्ताने पायात अति दाह, अतिशय उष्णता, लाली आणि सूज येते. पाय मऊ वाटतात, घशाशी जळजळ, विचार कुंठित होणे, घाम, मूर्च्छा, मद, तहान, स्पर्श सहन न होणे, वेदना, लाली, आणि सूज पिकणे; **रक्ताधिक वातरक्त**—अतिवेदना, टोचणी, तांबडी खाजयुक्त आणि स्रावयुक्त सूज. चिमचिम, स्निग्ध तसेच रुक्ष ह्या दोहोंनीही बरे वाटत नाही. **कफाधिक वातरक्त**— पायावर खाज, पाय पांढरे, थंड, पुष्ट, जखडलेले ताठरलेले, ओलसर, जड, स्निग्ध, खाजरे असतात. वेदना मंद असते आणि ते ओलसर वाटतात. **त्रिदोषज वातरक्त**—सर्व दोषांची चिन्हे असतात. हेतु आणि लक्षणे यांच्या संयोगाने, द्वंद्वज व त्रिदोषज वातरक्त जाणावे. **उपद्रव**—झोप न येणे, रुचि न लागणे, श्वास, मांस कुजणे, डोके जखडणे, मूर्च्छा, मद, वेदना, तहान, ज्वर, विचारात अडथळा, कंप, उचकी, पांगळेपणा, धावरे, टोचणी, भ्रम, झापड, मर्मस्थानात जखडल्यासारखी पीडा, बोटे वाकडी होणे, फोड आणि अर्बुद (अवाळू). **साध्यासाध्यत्व**—एकच दोषामुळे झालेले, नवीनच असलेले, उपद्रव न झालेले असे वातरक्त साध्य होय. दोन दोषांनी झालेले, सगळे उपद्रव न झालेले, असे, औषध व पथ्य असा आहार–विहार चालू आहे तोपर्यंत बरे असते. तसेच एक वर्षाचे जुने, औषध पथ्य आहार व विहारांनी बरे राहणारे असते. तीनही दोषांमुळे झालेले, सगळे उपद्रव झालेले, मोह ह्या एकच उपद्रवाने युक्त असलेले देखील, स्रावयुक्त वर्ण बिघडलेले व ज्यात पाय ताठरला आहे, अर्बुद (अवाळू) झाले आहे, संकोच झाला आहे, व इन्द्रियांचा दाह होत आहे असे असाध्य. तसेच गुडघ्यापर्यंत ज्यात त्वचा फुटलेली असते, अवयव फुटतात ते व उपद्रवांनी युक्त असलेले स्राव होत असलेले, प्राण व मांस यांचा क्षय इत्यादी लक्षणांनी युक्त असलेले असाध्य. **रिष्ट लक्षणे**– विचारात अडथळा, मूर्च्छा, मद, झोप न येणे, ज्वर, डोके जखडणे, तोंड बेचव, होणे, श्वास, संकोच होणे, कुजल्यासारखे होणे ही लक्षणे असताना रिष्ट समजावे. वात शाखा व सन्धीमध्ये शिरून रक्ताचा मार्ग अडवतो व वात आणि रक्त ही दोघेही एकमेकांना आवृत करून, लौकर मृत्यु आणतात. **चिकित्सा**– बलक्षय, मांसक्षय, तहान, ज्वर, मूर्च्छा, श्वास, खोकला, ताठरणे, तोंडाची चव जाणे, अन्न न पचणे विकृति सर्व शरीरभर पसरणे, अंगाचा संकोच होणे, हे उपद्रव झाले नसतील, रोगी बलवान, मनोनिग्रही, सर्व उपकरणे जवळ असलेला असा असेल तर त्याची चिकित्सा करावी. जलौकांच्या सहाय्याने, वातरक्त झालेला रोगी स्निग्ध असेल तर पुष्कळ वेळा थोडे थोडे रक्त काढावे. वायूला संभाळून दोषबलाला अनुसरून रक्त मोक्षण करावे. रोग्यास स्निग्ध करून स्नेहयुक्त द्रव्याचे विरेचन द्यावे. बस्ति द्यावा. वातरक्तावर बस्तीसारखी दुसरी कोणतीही चिकित्सा नाही. पोटीस, शिंपडणे, लेप, अभ्यंग, वारा शिरणार नाही असे घर, आनंद, मऊ अशी सुखशय्या, हळुवार असे अंग चेपणे, वातरक्तात प्रशस्त होय. गुग्गुळकल्प वातरक्तात उपयोगी आहेत. **अपथ्य** व्यायाम, संभोग, संतापणे, उष्ण, आंबट, खारट खाणे, दिवसा झोप घेणे, शरिरात वाजवीपेक्षा अधिक आर्द्रता करणारे, गुरु असे अन्न ह्या गोष्टी वर्ज्य.

**–रेतस्**–न., लक्षण० **अष्टरेतोदोषेष्वेकः, वातदुष्टं रेतः शुक्रम् वातेन तनु रूक्षं फेनिलमरुणं विच्छिन्नं सरुजं चिरान्निषिच्यते** ( असंशा. १ )

वि., **वातदुष्टं रेतः यस्य सः अयं प्रजोत्पादनासमर्थः** ( सुशा. ३.३ )

**वातरेतस्**–शुक्राच्या आठ दोषांपैकी एक. वाताने दुष्ट झालेले रेत म्हणजे शुक्र. वातामुळे शुक्र पातळ, रुक्ष, फेसकट; तांबूस, फाटलेले, वेदनायुक्त, व दीर्घकाळाने स्रवणारे असे होते. वाताने दुष्ट झालेले ज्याचे शुक्र आहे तो. प्रजोत्पादनास असमर्थ असतो.

**–रोग**–पु., रोग० **वातकृतदुःखम् अष्टदुश्चिकित्स्यमहागदेष्वेकः** ( सुसू. ३३.४-५ ) **वातजन्यो रोगः** ( सुनि. १.१ )

**वातदोषदूष्यसम्मूर्च्छनविशेषरूपः सर्वाङ्गैकाङ्गरूपो व्याधिः वात व्याधिरुच्यते** (चचि. २८) **हेतुः सम्प्राप्तिश्च रूक्षशीताल्पलघ्वन्नसेवनं व्यवायोऽतिप्रजागरो विषमोपचारो दोषरक्तातिस्रावो लङ्घनप्लवनातिगमनव्यायामाः धातुसंक्षयचिन्ताशोकरोगातिकर्षणदुःखशय्यासनक्रोधदिवास्वप्नवेगसन्धारणमभिघाताभोजनमर्माघाताः गजोष्ट्राश्व-**

शीघ्रयानापतंसनानि इत्येतैः कारणैः क्रुद्धो वातः सर्वाङ्गैकाङ्गसंश्रयान्विविधान्वातरोगान्करोति ( चचि. २८.१५-१९ ) वर्षासु वर्षान्ते निशान्ते दिवसान्ते वयोऽन्ते जीर्णान्ते वातजो रोगो भवति ( चचि. ३०.३०९-३१२ ) यदा प्रकुपितो वायुः स्वाः सिराः प्रतिपद्यते तदा वातजा रोगा जायन्ते ( सुशा. ७.९ ) देहे रिक्तानि स्रोतांसि पूरयित्वा बल्यनिलो विविधान् व्याधीन् करोति ( चचि. २८.१८-१९ ) हीनमात्रभोजनाद्वातरोगा भवन्ति ( अहृसू. ८.३ ) पूर्वरूपम्–वातव्याधीनाम् अव्यक्तं लक्षणं पूर्वरूपम् ( चचि. २८.१९-२० ) लक्षणानि–पर्वणां सङ्कोचः स्तम्भो भेदश्च। अस्थिभेदो रोमहर्षः प्रलापः पाणिपृष्ठशिरोग्रहः खाञ्जपाङ्गुल्यकुब्जत्वमङ्गानां शोषोऽनिद्रता गर्भशुक्ररजोनाशो गात्रस्य स्पन्दनं सुप्तता च शिरोनासाक्षिजत्रूणां ग्रीवायाश्च हुण्डनंभेदस्तोदार्तयः आक्षेपो मोह आयासः इत्येवंविधानि रूपाणि कुपितोऽनिलः करोति। हेतुस्थानविशेषाच्च कुपितोऽनिलो रोगविशेषकृद्भवेत् ( चचि. २८.२०-२४ ) अशीतिर्वातविकाराः–नखभेदो विपादिका पादशूलं पादभ्रंशः पादसुप्तता वातखुड्डता गुल्फग्रहः पिण्डिकोद्वेष्टनं गृध्रसी जानुभेदो जानुविश्लेष ऊरुस्तम्भ ऊरुसादः पाङ्गुल्यं गुदभ्रंशो गुदार्तिर्वृषणाक्षेपः शेफःस्तम्भो वङ्क्षणानाहः श्रोणिभेदो विड्भेद उदावर्तः खञ्जत्वं कुब्जत्वं वामनत्वं त्रिकग्रहः पृष्ठग्रहः पार्श्वावमर्दं उदरावेष्टो हृन्मोहो हृद्द्रवो वक्षउद्धर्षो वक्षउपरोधो वक्षस्तोदो बाहुशोषो ग्रीवास्तम्भो मन्यास्तम्भःकण्ठोद्ध्वंसो हनुभेद ओष्ठभेदोऽक्षिभेदो दन्तभेदो दन्तशैथिल्यं मूकत्वं वाक्सङ्गः कषायास्यता मुखशोषोऽरसज्ञता घ्राणनाशः कर्णशूलमशब्दश्रवणमुच्चैःश्रुतिर्बाधिर्यं वर्त्मस्तम्भो वर्त्मसङ्कोचस्तिमिरमक्षिशूलमक्षिव्युदासो भ्रूव्युदासः शङ्खभेदो ललाटभेदः शिरोरुक्केशभूमिस्फुटनमर्दितमेकाङ्गसर्वाङ्गरोगः पक्षवध आक्षेपको दण्डकस्तमो भ्रमो वेपथुर्जृम्भाहिक्का विषादोऽतिप्रलापो रौक्ष्यं पारुष्यं श्यावारुणावभासताऽस्वप्नोऽनवस्थितचित्तत्वं चेत्यशीतिर्वातविकाराः ( चसू. २०.११ ) उपद्रवाः–प्राणक्षय मांसक्षय श्वासतृष्णाशोषच्छर्दिज्वरमूर्च्छाऽतिसारहिक्कारूपाः ( सुसू. ३३.५-६ ) साध्याऽसाध्यत्वम्– निरुपद्रवा बलवतः नवा वातरोगाः साध्याः। सन्धिच्युत्यादयः वातरोगाः स्थानस्य गाम्भीर्याद्यत्नात्कदाचित्सिध्यन्ति न वा सिध्यन्ति (चचि. २८.७२-७४) रिष्टलक्षणानि–शूनं सुप्तत्वचं भग्नं कम्पाध्माननिपीडितं नरं वातव्याधिर्विनाशयेत् ( सुसू. ३३.७; असंशा. ११.३२ ) चिकित्सा–स्नेहः स्वेदोऽभ्यङ्गो बस्तिः स्नेहविरेचनं शिरोबस्तिः शिरःस्नेहः स्नैहिको धूमः सुखोष्णः स्नेहगण्डूषः, स्नैहिकं नस्यम्। रसाः मांसानि क्षीराणि स्नेहाः स्नेहयुक्तं च यत्स्यात्तत्सर्वम् उपयोज्यम् भोजनानि फलाद्यम्लयुक्तानि, स्निग्धानि, लवणानि; सुखोष्णाः परीषेकाः, संवाहनानि कुङ्कुमागरुपत्राणि, कुष्ठैलातगराणि, कोशेयौर्णिकरोमाणि, गुरूणि कार्पासानि, निवातातपयुक्तानि गर्भगृहाणि, मृद्वी शय्या, अग्निसन्तापः ब्रह्मचर्यमित्यादीनि योजनीयानि वातरोगेषु ( सुचि. ४.२१-२६; चचि.२८.७५-८३) स्निग्धस्विन्नस्य हि तोदभेदनाऽऽयामशूलाद्यो वातविकाराः शीघ्रमुपशाम्यन्ति। स्नेहश्च धातून्पुष्णाति बलं च देहे जनयति। तस्मात्पुनः पुनः स्नेहस्वेदौ शीलयेत्। तन्मृदूकृते च कोष्ठे नावतिष्ठन्त्यनिलाऽऽमयाः। सर्वशरीरगते वायौ विशेषतः पक्वाशयाऽऽश्रिते मृदुस्नेहविरेचनमेरण्डतैलं वा क्षीरेण दद्यात्। एवं हि विशुद्धस्रोतसोऽनावृतः पवनो विचरन् आशु शान्तिमेति। दुर्बलेऽविरेच्ये निरूहं पाचनीयदीपनीयद्रव्ययुक्तं भोजनं देयम्। एवमपिच अनिवृत्तौ अवपीडकस्नेहान् बस्तिकर्म च प्रयोजयेत् ( असंचि. २३ ) यदा स्नेहस्वेदैर्द्रुतः श्लेष्मा पक्काशये स्थितो, यदा वा पित्तं पक्काशयगतं रूपं दर्शयेत्तदा तत्र बस्तिर्विनियोज्यः (अहृचि. २१.८३) बलातैलादि विविधः सिद्धः स्नेहः पाने नस्येऽन्वासनेऽभ्यञ्जने च योग्यकाले सम्यक्प्रयुक्तो दुष्टान् वातान् आशु शान्तिं नयेत् ( अहृचि. २१.८२ )

**वातरोग**– वातामुळे होणारे दुःख, वातामुळे होणारा रोग. चिकित्सिण्यास कठिण असलेल्या आठ मोठ्यारोगांपैकी एक. निरनिराळ्या धातु व मलांपर्यंत आलेला वात हाच व्याधि. दोषदूष्य संमूर्च्छनविशेष सर्वांग रुप किंवा एकांगरूप असा जो वातदोष तोच वातव्याधि. **हेतु आणि सम्प्राप्ती**–रुक्ष, थंड, थोडेसे, लघु असे खाणे, अतिसंभोग, अतिजागरण,

विषम असे आहार विहार, दोषांचा व रक्ताचा अतिस्राव होणे, उपवास, पाण्यावर खूप वेळ पोहणे, पायी खूप चालणे, खूप व्यायाम करणे, शरीर धातूंचा क्षय होणे, चिन्ता, शोक, पूर्वीच्या रोगामुळे अतिशय कृश होणे, कडक, खडबडित अशा बैठकीवर व अंथरुणावर बसणे, उठणे, झोपणे, संतापणे, दिवसा झोप घेणे, वेग अडवणे, आमाने दुष्ट होणे, न जेवणे, मर्मावर मार लागणे, हत्ती, उंट, घोडा अशा वेगाने धावणाऱ्या वाहनावरून पडणे, इत्यादी कारणांनी कुपित झालेला वायु सर्वावयवाश्रित होऊन किंवा एकावयवाश्रित होऊन विविध प्रकारचे वात रोग करतो. पावसाळ्याचे शेवटी दिवसाच्या शेवटी, रात्रीच्या शेवटी, वयाच्या शेवटी म्हणजे म्हातारपणी, अन्नपचनाच्या शेवटच्या वेळी, वातजरोग होतात व वाढतात. प्रकुपित झालेला वायु जेव्हा स्वतःच्या सिरांचा (वातवह) आश्रय घेतो तेव्हा वातरोग होतो. शरिरातील रिकामी स्रोतसे पूर्ण भरून बलिष्ठ असा वात निरनिराळ्या प्रकारचे रोग करतो. कमी प्रमाणात जेवल्याने वातरोग होतात.

**पूर्वरूपे**— जो वातरोग व्हावयाचा असेल त्याचीच चिन्हे अल्प अशा प्रमाणात पूर्वरूपे म्हणून होतात. **लक्षणे**— पेरी आखडणे, ताठरणे, फोडल्या प्रमाणे वेदना, हाडे फोडल्याप्रमाणे वेदना, अंग शहारणे, बडबड, हात, पाठ व डोके जखडणे, लंगडेपणा, पांगळेपणा, कुबड निघणे, अवयव सुकणे, झोप न येणे, गर्भ, शुक्र व आर्तव ह्यांचा नाश होणे, अवयवांचे स्फुरण होणे आणि स्पर्शनाश, डोके, नाक, वाकडें होणे, डोळे व गळसरीची हाडे आत जाणे व मान ताठणे, फोडल्याप्रमाणे, टोचल्याप्रमाणे वेदना होणे, आचके येणे, विचार नीट न करता येणे, श्रम होणे अशा प्रकारची चिन्हे प्रकुपित झालेला वात करतो. विशिष्ट कारणे विशिष्ट स्थाने म्हणजे धातू व अवयव ह्यांच्यामुळे प्रकुपित वात विशिष्ट रोग करतो. ऐशी वातरोग—नखे फुटणे, पायाला चिरण्या, पायाला शूल, पाय निखळणे, पायाला स्पर्श न कळणे, वातरक्त, घोटा जखडणे, पिंढऱ्या वळणे, गृध्रसी म्हणजे ढुंगणातून घोट्यापर्यंत धमकणे, गुडघ्यात फुटल्याप्रमाणे वेदना, गुडघा निखळणे, मांड्या निश्चल होणे, मांड्या गळणे, पांगळेपणा, गुद बाहेर येणे, गुदामध्ये पीडा, वृषण लांबणे, शिश्न ताठर होणे, जांघाडात फुगवटी येणे. कंबरेत फूट, विष्ठा फुटीर होणे, उलटे पोट फुगणे, लंगडेपणा, कुबड, अतिशय बुटकेपणा, कंबर जखडणे, पाठ जखडणे, फासळ्यात दुखणे, पोट आवळल्याप्रमाणे वाटणे, मूर्च्छा, हृदयात धडधड, छातीत घासल्यासारखी पीडा होणे, छातीत अवरोध झाल्यासारखे वाटणे, छातीत वेदना, बाहू सुकणे, मानेचा पुढचा किंवा मागचा भाग जखडल्या सारखा वाटणे, घशात ठसका, हनुवटी व डोळा यात फोडल्याप्रमाणे वेदना, ओठ व दात फुटणे, दात ढिले होणे मुकेपणा, अडखळत बोलणे, तोंड तुरट होणे, तोंड सुकणे, रसाचे ज्ञान न होणे, वास न येणे, कानात शूल, न होणारे शब्द ऐकू येणे, मोठ्याने बोलले तर ऐकायला येणे, बहिरटपणा, पापण्या ताठरणे, पापण्या संकुचित होणें, दृष्टीचे रोग, डोळ्याचा शूल, डोळ्याचा नाश, भुवयांचा भंग होणे, शंखामध्ये व कपाळामध्ये फोडल्याप्रमाणे वेदना, डोके दुखणे, केसाच्या मुळाजवळची त्वचा फाटणे, तोंड वाकडे होणे, एकाच बाजूला व सर्व शरिरात वेदना होणे, अर्धांगवात, आचके येणे, लाकडाप्रमाणे शरीर ताठणे, डोळयापुढे अंधेरी येणे, भ्रम, कंप, जांभई, उचकी, मन विषण्ण होणे, अतिशय बडबड, रूक्षता खरखरीतपणा काळसर, तांबूस वर्ण, झोप नसणे, चंचल चित्त असणे असे ऐशी विकार होत. **उपद्रव**—प्राणक्षय, मांसक्षय, श्वास, तहान, शोष, वान्ती, ज्वर, मूर्च्छा अतिसार उचकी. **साध्यासाध्यत्व**—उपद्रव नसलेला, रोगी बलवान असला व रोग नवा असला तर साध्य. सन्धि निखळणे इत्यादी वातरोग त्यांचे स्थान गंभीर असल्याने मोठ्या प्रयत्नाने कदाचित् साध्य होतात किंवा होत नाहीत **रिष्टलक्षणे**—सूज, त्वचेला स्पर्श न कळणे, एखादा अवयव मोडणे, अंग कांपणे, पोट फुगणे, ह्या लक्षणांनी त्रासलेल्या रोग्यास वातरोग मारतो. **उपचार**—स्नेह, शेक, अभ्यंग-बस्ति, स्निग्ध रेचके, शिरोबस्ती, डोक्याला स्नेह, मर्दन करणे, स्नेहयुक्त धूम्रपान, कोमट स्नेहाच्या गुळण्या, नाकात स्नेह घालणे, मांसरस, मांस, दूध, तूपतेल इत्यादी स्नेह किंवा त्यांनी युक्त जे जे असेल ते ते उपयोगात आणावे.

आंबट फळयुक्त लवणमिश्रित स्निग्ध अशा अन्नाचे सेवन, कोमट पदार्थांचे सिंचन, अंग रगडणे, केशर, अगरु, तमालपत्र, कोष्ठ, वेलदोडा, तगर, यांचे सेवन; रेशमी तसेच लोकरीचे केसयुक्त, कापसाचे जड कपडे ( लेप दुलई वगैरे ), वारा नसलेले व ऊन्ह असलेले तळघर, मऊ शय्या, अग्नीचा शेक, व ब्रह्मचर्य पाळावे. स्निग्ध करून शेकल्याने, टोचणी, फूट, आचके, शूल, इत्यादी वातविकार लौकर शमतात. स्नेह धातूंना पुष्ट करतो व शरिराचे बल वाढवितो. म्हणून पुनः पुनः स्नेह आणि शेक करावा. त्यांनी मृदु केलेल्या कोठ्यात वातरोग रहात नाहीत. सर्व शरीरगत वायूला विशेषतः पक्वाशयामधल्या वायूला मृदुस्नेहरेचक किंवा दुधाबरोबर एरंडेल रेच द्यावे. या प्रमाणे विशुद्ध स्रोतसे झाल्यानंतर वायु आपल्या मार्गाने संचार करून ताबडतोब शान्त होतो. ज्याला विरेचन देता येत नाही अशा दुर्बल रोग्याला शोधकबस्ती द्यावा. दीपक पाचक द्रव्यांनी युक्त आहार द्यावा. या क्रमाने करूनही गुण येत नसेल तर जेवणाच्या अगोदर आणि जेवण जिरल्यानंतर स्नेह प्यायला द्यावा. स्निग्ध बस्ति द्यावा. जेव्हा स्नेह आणि शेक ह्यानी पातळ झालेला कफ पक्वाशयात असतो तसेच पित्त पक्वाशयात असल्याचे दिसते तेव्हा वस्ती द्यावा. बला तैल इत्यादी नाना प्रकारचे सिद्ध स्नेह पिण्याला बस्तीला अभ्यंगाला नाकात घालावयाला योग्य वेळी चांगल्या रितीने उपयोगात आणले तर दुष्ट वायु ताबडतोब शान्त होतो.

**-रोगिक**-वि., **वातरोगविषयकः, यथाऽध्यायः** ( चसू. २८.२९ )
वातरोगासंबंधी; जसे वातरोगविषयक अध्याय.

**-रोगिन्**-वि., **वातव्याध्यातुरः**
( चचि. २८.१०५.१०६; असंशा. २.२ ) वातरोगी.

**-वर्ण**-पु., **वातस्य वर्णः, यथाऽरुणकृष्णादिः। यद्यप्यव्यक्तस्य वायोर्वर्णोऽसम्भवस्तथाऽपि वातदुष्टे दूष्ये वातेनारुणकृष्णौ वर्णौ भवतः तौ च पञ्चमहाभूतविकारात्मनः भवतः** ( ड. सुशा. २.४ )
वाताचा वर्ण. जसे तांबुस, काळा इत्यादी. जरी वायु हा अव्यक्त असल्यामुळे त्याला वर्ण असणे असंभव आहे. तरी वातदुष्ट धातु व मलांना वाताने अरुण कृष्ण हे वर्ण होतात. वायु तन्मात्रा व वायु महाभूत यांना वर्ण नाही पण पंचमहाभूत विकार असलेल्या शारीर वायूला वर्ण असतो.



**-वहस्रोतस्**-न., **स्रोतो० वातं यत्स्रोतः वहति, तद्** ( सुउ. ५५.३८ ) द्र० ' **स्रोतस्** '
वातवाही स्रोतस. जे वाताचे वहन करते ते.

**-वाहिनी**-स्त्री., **सिरा० बाहुल्याद् वातं वहन्ती वातवाहिनीनां संख्या पञ्चसप्ततिशतं भवति,** (सुशा. ७.६) **विशेषस्थानं तानि श्रोणिगुदपक्वाशयाः** ( सुसू. २१.६ )
वातवाही शिरा. बाहुल्याने वातघटक वहाणारी. संख्या १७५. विशेषस्थान-श्रोणि, गुद व पक्वाशय.

**-विकार**-पु., **वातरोगः, तेच अशीतिसंख्याकाः** ( असंसू. २० ) द्र० ' **वातरोग** '
वातविकार. ते ऐंशी आहेत.

**-विध्वंसन**-पु., **पारदयोग० पारदाभ्रककांस्यशुल्बादिसाधितोऽयम्, अशीतिवातरोगहरः** ( र. २१.१२४-१३४ )
पारा, अभ्रक, कासे इत्यादींचा योग. ऐंशी वात रोगनाशक.

**-विनाशनी**-स्त्री., **वनस्पति० कर्तृणभेदः, कपटम्** ( ध. १.८२; पृ. २२ ) द्र० ' **कर्तृण** '
रोहिस गवत.

**-विपर्यय**-पु., **नेत्ररोग० लक्षणम्-नेत्रं जिह्मं शूनं च भवति तीव्रा व्यथा पैच्छिल्यादिराहित्यं च** ( असंउ. १८ )
डोळ्याचा रोग. डोळा वाकडा, सुजलेला होतो. तीव्र वेदना, बुळबुळीतपणा वगैरे नसतो.

**-वृद्धि**-स्त्री., **वातदोषस्य वृद्धिः** ( अहृसू. ११.२४ )
वाताची वृद्धि.
पु., **रोग० वातकृतो वृद्धिरोगः कुरण्डः** ( मानि. )
वाताने वृषणाची वृद्धि झालेला रोग.

**-वृष्टि**-स्त्री., **वातेन मिश्रिता वृष्टिः** ( ड. सुसू. ६.२४ )
वाऱ्याने मिश्रित वृष्टि. पाऊस.

**-वेदना**-स्त्री., **वातकृतं दुःखम् पीडा वा यथा-तोदभेदादिः** ( सुक. ४.३७; सुशा. २.४ )
वाताने होणाऱ्या वेदना, पीडा. जसे टोचणी, फूट इत्यादी.

**-व्याधि**-पु., **रोग० वातदोषकृतः रोगः** ( चसू. १३.४४ ) द्र० ' **वातरोग** '
वातरोग. वातदोषाने केलेला रोग.

वि., वात एव व्याधिर्यस्य रोगिणः स ( नरः ) ( चइ. ९.८-९ )

वात हाच रोग आहे ज्याचा असा रोगी.

**-व्याधिचिकित्सित**—न., अध्यायसंज्ञा०(सुचि.४.१; चचि. २८.१; असंचि. २३; अहृचि. २१.१ )

अध्यायाचे नाव. वातरोगांचे उपचार यात आहेत.

**-व्याधिनिदान**—न., अध्यायसंज्ञा० ( सुनि. १.१; असंनि. १५; अहृनि. १५.१ )

वातरोगांचे निदान कारणादि ज्यात सांगितले आहेत तो अध्याय.

**-शमन**—वि., **बातस्य शमनं करोति इति, यथा द्रव्याणि भद्रदार्वादीनि वातघ्नानि विदार्यादिगणो वीरतरादिगणश्च, बृहत्पञ्चमूलं लघुपञ्चमूलं वल्ली-पञ्चमूलं कण्टकपञ्चमूलं जीवनपञ्चमूलं मध्यम-पञ्चमूलं चेति वातशमनानि** ( असंसू. १४ )

वातशामक औषधे. जसे देवदारु इत्यादी वातघ्न द्रव्ये. भुईकोहळा इत्यादी वायवर्णा इत्यादी मोठे पंचमूळ, लघुपंचमूळ, वेलपंचमूळ, काटेपंचमूळ जीवनीयपंचमूळ, मध्यम पंचमूळ ही सर्व वातशामक होत.

**-शूल**—पु., **लक्षण० वातेन कृतः शूलः** (चइ. १०.१३)

वाताने केलेला शूल.

**रोग० शूलरोगभेदः, वातजशूलः** ( मानि. ) **द्र०** ' **शूल** ' शूलरोगाचा प्रकार.

**-शूलास्त्र**—न., **सिद्धयोग० वातशूलनाशकः** ( र. १८.१३१-१३३ )

एक सिद्धयोग. वातशूलनाशक.

**-शोणित**—न. **रोग० वातरक्तम्** ( चसू. २४.१२; सुसू. २४.९; र. २१.८० ) वातरक्तविकार.

**-शोणितचिकित्सित**—न., अध्यायसंज्ञा० चचि. २९.१ )

वातरक्ताचे उपचार दिलेला अध्याय.

**-शोणितिक**—वि., **वातरक्तरोगयुक्तः** ( चसू. १३.३५ )

वातरक्तरोगयुक्त.

**-शोथ**—पु., **रोग० शोथभेदः वातजः शोथः, वातिकः शोथः** ( काखि. १७; चसू. १८.७.( १ )

**द्र०** ' **शोथ** ' सुजेचा प्रकार, वाताची सूज.

**-शोफ**—पु. **रोग० शोथरोगभेदः, वातशोथः** ( अहृनि. १३.३०; चचि. १२.७५ ) **द्र०** ' **शोथ** ' सुजेचा प्रकार. वाताची सूज.

**-श्लेष्मसमुत्क्लेश**—पु., **लक्षण० वातस्य श्लेष्मणश्च उद्गिरणम्** ( चसू. ५.३४ )

वात व कफ यांचे घटक छाती व तोंड यांच्या वाटे-बाहेर येताहेत असे दिसणे.

**-श्लेष्महरगण**—पु., **द्रव्यगण० वातकफहरद्रव्यसङ्ग्रहः शालिपर्णी - पृश्निपर्णी-बृहती-कण्टकारिका-बला-श्वदंष्ट्रा-बिल्व-अग्निमन्थ-पाठा-नागर - धान्यक-शठी-पलाश- हपुषा- वचा - जीरक - पिप्पली-यवानी-पिप्पलीमूल-चित्रक-गजपिप्पली-वृक्षाम्ल दाडिमाम्ल-हिङ्गु-बिड-सैन्धवानि इत्यैतैः सम्पन्नो वातश्लेष्महरः गणः** (चचि. १९.२६-२८) **तद्गुणाः- दीपनः पाचनो ग्राही बल्यो रोचनोऽऽतिसारिणां शस्तश्च** ( चचि. १९.२९ )

**वातकफहरगण**— सालवण, पिठवण, डोरली, रिंगणी, चिकणा, गोखरु, बेल, अरणी, पहाडमूळ, सुंठ, धणे, कचोरा, पळस, शेरणी, वेखंड, जिरे, पिंपळी, ओवा, पिंपळमूळ, चित्रक, गजपिंपळी, अमसूल, डाळिंब, हिंग, बिड, सैंधव. **गुण**—दीपक, पाचक, मळ बांधणारा, बलबर्धक, रोचक, अतिसारी रोग्याला प्रशस्त.

**-श्वयथु**—पु., **लक्षण० वातसम्भवः शोथः** ( काखि. १७.१४ ) **द्र०** ' **शोथ** ' वाताची सूज.

**-सङ्ग**—पु., **लक्षण० वातस्याप्रवृत्तिः, सक्तिः** ( चचि. ५.१० )

वाताची न सरण्याची प्रवृत्ति. वात न सरणे, अडणे.

**-सङ्घात**—पु., **वातरोगसमूहः** ( र. ११.२१ )

वाताच्या रोगांचा समूह.

**-सम्भव**—वि., **वातादुत्पन्नः यथा-वातसंभवः श्वयथुः** ( काखि. १७.१४ )

वातापासून उत्पन्न झालेला. जसे वाताची सूज.

**-संरोधजरुजा**—स्त्री., **लक्षण० वातमार्गसंरोधादुत्पन्नः शूलः** ( सुसू. ४४.४९ )

वाताच्या संचाराच्या मार्गात अडथळा आल्याने उत्पन्न झालेली पीडा.

**-संशमनवर्ग**—पु., **द्रव्यगण० वातघ्नगणः** ( सुसू. ३९.७ )

वाताचे शमन करणारा औषधिवर्ग.

**-सह**—वि., **वातं सहमानः** ( चसू. १३.४७ )

वारा सहन करणारा.

**-सहत्व**—न., **लक्षण० वातं सोढुं शीलमस्य सत्त्वम् वातसहिष्णुत्वम्** ( चनि. १.३३ )

वात सहन करण्याचा स्वभाव. वातसहिष्णुता.

**-साधारण**-वि., **न च वातं कोपयति न च वातं शमयति इति, यथा शशः** ( सुसू. ४६.८० )
जो वाताचे शमन करीत नाही व वाताचा प्रकोपहि करीत नाही तो. जसे सशाचे मांस.

**-सार**-पु., **वनस्पति० बिल्वः** (ध. १.१०७; पृ. २७)
बेल.

**-स्थान**-न., **वातदोषस्य स्थानम्**
( चसू. २०.८; असंसू. २० )
वातदोषाचे स्थान. जसे पक्वाशय, पक्वाधान इत्यादी.

**-हत**-वि., **वातेन हतम्, यथा-शाकम्**
(चसू. २७.३१६)
वाऱ्याने-वाताने बिघडलेले. जसे फळ, भाजी इ०.

**-हतवर्त्मन्**-न., **नेत्ररोग० नेत्रवर्त्मगतो रोगः लक्षणम्-यदा वर्त्म विमुक्तसन्धि निष्क्रियम् अशक्यनिमीलनं सरुजमरुजं वा तदा तद्वातहतवर्त्म विद्यात्** ( सुउ. ३.२३; असंउ. ११ )
डोळ्याच्या पापणीचा रोग. जेव्हा पापणीच्या सांध्यात वाताने दुष्टि होऊन ते मोकळे होतात. निष्क्रिय होऊन मिटू शकत नाहीत. वेदना केव्हा होतात केव्हा होत नाहीत, तेव्हा वातहत वर्त्म म्हणतात.

पु., **वातशमनवर्गः ( गणः ) द्रव्याणि-भद्रदारु-कुष्ठ-हरिद्रा-वरुण-मेषशृङ्गी-बला-अतिबला-आर्तगल-कच्छुरा-सल्लकी-कुबेराक्षी-वीरतरू-सहचर-अग्निमन्थ-वत्सादनी-एरण्ड-अश्मभेदक-अलर्क-अर्क-शतावरी-पुनर्नवा-वसुक-वशिर-काञ्चनक-भार्ङ्गी-कार्पासी-वृश्चिकाली-पत्तूर-बदरयव-कोल-कुलत्थप्रभृतीनि, विदारिगन्धादिश्च द्वे चाद्ये पञ्चमूल्यौ इति** ( सुसू. ३९.७ )
वाताचे शमन करणारा वर्ग. देवदार, कोष्ठ, हळद, वायवर्णा, मेढशिंगी, पांढऱ्या फुलांचा चिकणा, पिवळ्या फुलांचा मोठा चिकणा, अर्जुनसादडा, खाजकुहिली, साळई, पाडळ ( पांढरी ), भिलावा, निळी कोऱ्हांटी, अरणी, गुळवेल, एरंड, पाषाणभेद, पांढरी रुई, रुई, शतावरी, पुनर्नवा, काळा अगरू, आघाडा, धोत्रा, भारंगी, रानकपाशी, विंचवी, रक्तचंदन, बोर, जव, मोठेबोर, कुळीथ, सालवण इत्यादी गण व मोठी व लहान पंचमुळे.

**-हरमूल**-न., **वातघ्नवनस्पतिमूलम्, यथा दशमूलम्** ( सुचि. ५.७ ) वातनाशक मूळ, जसे दशमूळ.

**वातल**-वि., **वातदोषाधिकः** (चवि.६.१६;अहसू.१४.८)
**वातप्रकृतिकपुरुषः** ( चसू. ७.३९ ) **गर्भात्प्रभृति वातदोषाधिक्यं यस्य, सः** ( चवि. ८.९८ )
वातुळ. वातदोष अधिक असलेला, वातप्रकृतीचा पुरुष. गर्भावस्थेपासूनच ज्याच्या शरिरात वात दोषाचे आधिक्य आहे असा.
**द्रव्यकर्म० वातवृद्धिकरम् । यथा 'कलायस्त्वतिवातलः'** ( अहसू. ६.१८ )
वातवृद्धिकारक-जसे वाटाणा अतिशय वातुळ आहे.
**वातदुष्टिः, अयं बस्तियन्त्रदोषविशेषः** (चसि. ५.६)
वाताची दुष्टि. बस्तीच्या यंत्रातील एक दोष.
पु., **वनस्पति० प्रियङ्गुः** (रा. १६.१४२; पृ. २२५)
गव्हला, वाघांटी.

**(वातला)**-वि., **वातप्रकृतिः ( नारी )** ( चचि. ३०.९ )
वातप्रकृतीची ( स्त्री )

**वाताम**-पु., न., **फल० नेत्रोपमफलमुत्तरापथे प्रसिद्धम् । स्निग्धमधुरमज्जम्** ( सुसू. ४६.१८७-१८८; असंचि. २४; अहसू. ६.१२० ) **अमृतप्राशे उपयोजितमेकं द्रव्यम्** ( चचि. ११.३७ ) **गुणाः-मधुरः उष्णः गुरुः स्निग्धो बृंहणो वृष्यो बलप्रदो वातघ्नः कफपित्तवर्धनश्च** ( चसू. २७.१५७ )
**पित्तश्लेष्महरः** ( सुसू. ४६.१८७-१८८ )
हिं.—बदाम मीठे, बदाम कडवे.
**म.—गोडे बदाम, कडू बदाम.**
गु.—बादाम मीठी, बादाम कडवी.
बं.—बादाम.
ता.—नटवडुम, बदाम कोट्टाई ( नाड. )
फा.—बदामशीरी, बदाम तल्ख.
बदाम. डोळ्याच्या आकाराचे फळ. उत्तरप्रदेशात प्रसिद्ध. याच्या अठळीतील गर गोड व स्निग्ध असतो. **गुण**—गोड, उष्ण, जड, स्निग्ध, पौष्टिक, शुक्रधातूला हितकर, बलदायक, वातघ्न, कफपित्त वाढविणारा, अमृतप्राशात उपयोगी द्रव्य.

**वातामादिगण**-पु., **गण० वातामादिद्रव्याणां समूहः । वातामाऽक्षोडाऽभिषुक निचुल-पिचु-निकोचक-उरुमाणप्रभृतीनि । गुणाः-पित्तश्लेष्महरः स्निग्धोष्णः गुरुः वातामवत् अस्य गुणाः**
( सुसू. ४६.१८७-१८८ )

बदाम इ० चा गण. बदाम, आक्रोड, अंगुर, जलवेतस, कापसाचे बी, पिस्ता, नास्पात इत्यादी. पित्तकफनाशक, स्निग्ध, उष्ण, पचावयास जड, वगैरे गुण बदामा सारखे आहेत.

**वाताण्ड**–पु., रोग० वातवृद्धिः, वातजाण्डवृद्धिः ( असंउ. ४८ ) द्र० ' वृद्धि ' वातज अण्डवृद्धि.

**वातानुलोमन**–न., वातस्यानुलोमनम्–स्वमार्गप्रवर्तनम् ( अहृसू. ५.७६ )

वात आपल्या मार्गाने बाहेर जाणे. वात सरकणे.

·वि., **वातानुलोम्यकरम्, मार्गावृतस्य वातस्य स्रोतः–शुद्धिकरत्वेन स्वमार्गप्रवर्तकम्। यथा बिडं वातानुलोमनम्** ( सुसू. ४६.३१६ )

मार्गात वात अडल्यावर त्या वाताचे ते स्रोतस मोकळे करणे व वाताला आपल्या मार्गाने घालविणे हे कार्य करणारे द्रव्य. जसे बिडलोण हे वातानुलोमक आहे.

**वातानुलोम्य**–न., उपक्रम० **वातस्यानुलोमनम्** ( चसू. १३.५८ )

वाताचे अनुलोमक. वात सरणारे, वात सारक.

**लक्षण० वातस्य स्वमार्गे प्रवर्तनम्** (अहृसू. १६.३०)

वाताचे आपल्या मार्गाने बाहेर सरणे.

**वाताप्रवर्तन**–न.,लक्षण० वातस्याप्रवर्तनम्, वातावरोधः ( चसू. ७.८ )

वात आपल्या मार्गाने न सरणे. वाताचा अवरोध होणे.

**वाताघात**–पु., रोग० **अष्टमूत्रोपघातेष्वेको भेदः मूत्रोपघातः मूत्रकृच्छ्रः** ( ड. सुउ. ५९.३) **लक्षणम्–वाताघातपीडितो मुष्कं मेहनं बस्तिं च पीडयित्वाऽल्पाऽल्पं मेहति वाताघातेन** ( सुउ. ५९.४ ) द्र० **' मूत्राघात '**

आठ प्रकारच्या मूत्राघातांपैकी एक. यात वाताने वृषण, शिश्न व बस्ति ही दाबून थोडे थोडे लघ्वीला होते, कळा येतात.

**वातातपस्थिति**–स्त्री., **रसायनभेदः, यच्च वातातपाद्यपरिहारस्थित्या रसायनं क्रियते**

( हें अहृसू. २०-३६; असंसू. २९ ) **वातातपिकम्**

जे रसायन वारा, ऊन यांना न टाळता म्हणजे यात वावरूनही केले जाते ते.

**वातातपिक**–न., **रसायनभेदः, वातातपसेवयाऽपि यत्क्रियते तद् द्विविधरसायनप्रयोगयोः एकम्,** ( चचि. १.१६ )' **रसायनानां द्विविधं, कुटी, प्रावेशिकं मुख्यं वातातपिकमन्यथा** ( अहृउ. ३९.५; असंसू. ४९ )

वारा, ऊन यांचे सेवन करून जे रसायन केले जाते ते कुटीमध्ये राहून केले जाते ते मुख्य. त्याला कुटीप्रावेशिक म्हणतात. असे हे २ प्रकार रसायनसेवनप्रयोगाचे आहेत.

**वातात्मक**–वि., **वातप्रकृतिकः** ( सुचि. ३.३ )

वातप्रकृतीचा.

**वात आत्मा हेतुर्यस्य सः ( वातिकः ) यथा वातजविसर्पः** ( सुनि १०.४ )

वात हे कारण आहे ज्याचे तो जसे वातज ज्वर धावरे इ०.

**वातादि**–वि., **वात आदिर्येषां ते, वातपित्तकफाः** ( असंशा. ८ )

वात इत्यादी. वात ज्यात मुख्य आहे ते. वात पित्त कफ.

**वातादिधामन्**–वि., **वातादिस्थानस्थितम्; यथा रक्तम्** ( अहृसू. २६.५५ )

वातादिकांच्या घरात–स्थानात असलेले. जसे रक्त.

**वातादिमार्ग**–पु., **वातादिवहानां मार्गः, वातादिवहानां दशधमनीनां हृदयं स्थानम्, रसवहा एव या दश धमन्यः हृदयाश्रया उक्तास्ता एव वातादिवहाः** ( चक्र. चचि. २४.३५ )

वातादिवाहक मार्ग. हृदयाश्रयी ज्या दहा रसवाही धमनी सांगितल्या आहेत त्याच वातादिदोषांचे वहन करतात. या वातादिवाहक दहा धमनींचे स्थान हृदय आहे.

**वातादिविघात**–पु., **वातादिदोषबाधनम्**(सुशा.१०.४६)

वातादि दोषांची बाधाविकृति.

**वाताध्मात**–वि., **वातदोषपूरितम्, यथा शरीरम्** ( चवि. ८.१२७ )

वात दोषाने पूर्ण व्यापलेले-भरलेले जसे शरीर.

**वातायन**–न., **भित्तिगवाक्षः** ( असंसू. २१.४ )

खिडकी. भिंतीतील खिडकी.

**वातारि**–पु., वनस्पति० **टिण्टुकः** ( रा. ९.१४३ )

टेंटू–मोठ्या पंचमूळांपैकी एक.

**सूरणः** ( धपरि. ४.६; पृ. १६८ ) सुरण.

**यवानी** ( रा. ६.१४०; पृ.८८ ) ओवा.

**एरण्ड** ( रा. ८.४४५; पृ.६८ ) एरण्ड.

**विडङ्गम्** ( रा. ६.१५; पृ. ७१ ) वावडिंग.

**नीलः** ( रापरि. ९११.२०१; पृ. ३६४ )

नीळ, शनीचा खडा. ( रत्न )

**भल्लातक** (रा. ११.२०१; पृ. १२३)
भिलावा, बिब्बा.
**पारदयोग॰ पारदगन्धकत्रिफलाचित्रकादिसाधितोऽयं वृद्धिरोगनाशकः** ( र. १८.३१-३६; र. २१.४-९ )
पारा, गंधक, त्रिफळा, चित्रक इत्यादी औषधांनी तयार केलेला पाऱ्याचा योग. अंडवृद्धिरोगनाशक.
**वनस्पति॰ स्नुही** ( रा. ८.३५६; पृ. ५६ )
त्रिधारी निवडुंग.
**निर्गुण्डीभेदः शेफाली, निर्गुण्डी** ( रा. ४.१२१; पृ. ५६ ) निर्गुंडी.
**पुत्रदात्री** ( रा. परि. ३.४७; पृ. ३३३ )
पुत्र देणारी वनस्पती. हिच्या फुलांच्या माळा गळ्यात घालतात.
**भार्ङ्गी** ( रा. ६.९६ पृ. २० )
भारंगी, भारंगमूळ.

**वातार्त**–वि., वातपीडितः। **स्नेहार्हेष्वेकः** ( अहसू. १६.६ )
वाताने त्रस्त, पिडलेला. स्नेह देण्याला योग्य एक रुग्ण.

**वातार्दित**–वि., **वातपीडितः** ( अहसू. १९.५२ )
वाताने पिडलेला, त्रस्त.

**वातावृत**–वि., **वातेनाऽऽवृतः। यथा स्नेहः** (चसि.४.२८)
रिकामे पोटी बस्तिमार्गाने दिलेला स्नेह अन्नाने आवृत न होता वाताने आवृत होतो म्हणजे अडवला जातो.

**वातावृतपथ**–वि., **वातेनावरुद्धं स्रोतः यस्य, सः** ( अहसू. १६.१० )
ज्याचा मार्ग-स्रोतस वाताने रुद्ध केलेला अडवलेला आहे तो.

**वाताशय**–पु, **वातस्याशयः पक्वाशयः। वातस्थानम्। पक्वाधानम्** ( सुशा. ५.८ )
वाताचा आशय, वाताचे स्थान, पक्वाशय, पक्वाधान
**उदानवायोराधारः फुप्फुसः** ( शार्ङ्गधर )
उदान वायूचा आधार फुप्फुस.

**वाताष्ठीला**–स्त्री., **रोग॰** ( चचि. १३.१६२ ) **वातेन प्रकुपितेन अष्ठीलावत् कृतो ग्रन्थिः। संप्राप्तिः– नाभेरधस्तात् पक्वाशये संजातः संचारी अचलो वाऽष्ठीलावद्घनोर्ध्वमायतोन्नतो ग्रन्थिः वाताष्ठीलेति ज्ञायेत** ( सुनि. १.९० ) **लक्षणम्–स ग्रन्थिः संचारी वाऽचलो वा भवति। वातविण्मूत्रमार्गाणामवरोधं करोति** (मानि) **रिष्टलक्षणम्– अतिसंवृद्धा वाताष्ठीला हृत्संनिधौ तिष्ठन्ती हृदि दारुणा रुजाकरी अन्नद्वेषकरी च भवति। सा सद्यो जीवितं मुष्णाति** ( चइ. १०.४; सुसू. ३१.१८; असंशा. ११ )
वात प्रकुपित होऊन आठळीसारखी केलेली गाठ. संप्राप्ति व लक्षणे– बेंबीच्या खाली पक्वाशयात हालणारी किंवा स्थिर आठळीसारखी घट्ट पसरट वर फुगलेली गाठ उत्पन्न होते. ही गाठ वात मल व मूत्र मार्गाचा अवरोध करते. मरणदर्शक चिन्हेही अति वाढली असता हृदयापर्यंत येते, व हृदयात दारुण वेदना करते अन्नद्वेष होतो व ताबडतोब मरण येते.
**रोग॰ मूत्राघातरोगेष्वेकः, संप्राप्तिः–गुदबस्त्योरन्तरमाश्रितः अपानवायुः अष्ठीलावद्घनमचलमुन्नतं ग्रन्थिं करोति। लक्षणम्–तेन बस्तावाध्मानं विट्सङ्गो मूत्रसङ्गोऽनिलसङ्गः बस्तावातिवेदनादिलक्षणानि च भवन्ति** ( सुउ. ५८.७-८; असंनि. ९ )
मूत्राघात रोगांपैकी एक. गुद व बस्ति या मधील भागात आश्रय करून अपानवायू आठळीप्रमाणे घट्ट न हालणारी फुगलेली गाठ करतो. **लक्षण–** बस्ति फुगतो, मळ साचतो, मूत्र व वात साठतात, बस्तीत अति वेदना होतात.

**वातासहत्व**–न., **लक्षण॰ वातसोढुत्वाभावः** ( चनि. १.३३ )
वात सहन न होणे. वाताबद्दल असहिष्णुता. वात म्हणजे वारा.

**वातास्र**–न., **रोग॰ वातरक्तम्** ( र. १२.१-८ )
वातरक्त.

**वातिक**–वि. **वातप्रकृतिकः ( मनुष्यः )** ( चसू. १३.८७ ) **वातविकारवान्** ( चसू. १४.२७ ) **वातभूयिष्ठः** ( सुशा. ४.६७ )
वातप्रकृतीचा. वातविकारी. वाताधिक.
**वातहरं वाते हितम्** ( चक. चसू. १४.४४ )
वातनाशक, वातावर हितकारक.
**–षण्डक**–पु., **षण्डभेदः वायत्रिदोषाद्यस्य वृषणौ नाशं गतौ सः** ( चशा. २.२१ )
षंडाचा प्रकार. वात व पित्त दोषांनी ज्याच्या वृषणाचा नाश झाला तो.

**वातेन्द्रिय**–पु., न., नपुंसकभेदः सम्प्राप्तिः–यदा तु स्त्रीरतौ पुंसः पूर्वं कृतार्थां सम्प्राप्तरत्यवसाना भवति ततोऽस्याः स्त्रियः पश्चात्पुंसः शुक्रमुत्सृष्टं भवति; रतिकालभूतेन हर्षेणानवस्थितचेतसः सत्या अत एव कारणाद्वातो दुष्टस्तच्छुक्रं पश्चादुत्सृष्टं विगुणीकरोति, गर्भशुक्रबीजभागे विकृतिमापादयत्यस्य गर्भस्य च स वातः पुंस्त्ववहानि स्रोतांसि चोपहन्ति; तदा जातो नपुंसको नाम्ना वातेन्द्रियो भवति । लक्षणम्– स स्त्रिया सङ्गतः शुक्रवन्मेढ्रेन वातमेवोत्सृजति ( इन्दु असंशा. २ )
**नपुंसकाचा प्रकार– संप्राप्ति–** जेव्हा संभोगाचे वेळी स्त्रीचे समाधान प्रथम होते व नंतर पुरुषाचे शुक्र योनीत पडते, अशा वेळी स्त्रीच्या समाधानानंतर ही मैथुन चालू राहते. यात मैथुनाचा अति योग होतो. स्त्रीचा हर्ष संपलेला असतो. स्त्रीच्या अशा मनःस्थितीत वायु दुष्ट होऊन पुरुषाचे ते शुक्र दुष्ट करतो. अशा अवस्थेत गर्भ धारणा झाल्यास गर्भाच्या शुक्राच्या बीज भागात विकृति करून, तेथील शुक्रवाही स्रोतसांतही दुष्टि करतो तेव्हा तो वातेंद्रिय नावाचा नपुंसक गर्भ होतो. **लक्षण**– पुढे तारुण्यात संभोग संपताना याच्या शिश्नातून शुक्र न पडता शुक्राच्या ऐवजी वातच बाहेर येतो.

**वातोद्धत**–वि., वातविक्षिप्तम् । यथा रेतः ( चसू. ९.३२ )
वाताने फेकलेले (टाकलेले, सोडलेले) जसे शुक्र.

**–वातोपक्रम**–पु., वातस्योपक्रमः उपचारः ( अहसू. १३.१-३; असंसू. २१ )
वाताचा उपचार, चिकित्सा.

**वातोपद्रव**–पु., वातव्याधिः ( चवि. ८.१२७ )
वाताचा उपद्रव–रोग.

**वात्सकफल**–न., वनस्पति० कुटजफलम् इन्द्रयवः ( सुउ. ४०.४४ )
इंद्रजव, कुड्याचे फळ.

**वात्स्य**–पु., काश्यपसंहितायाः प्रतिसंस्कर्ता ( काइं. )
काश्यप संहितेचा प्रतिसंस्कार करणारा.
**वृद्धजीवकवंश्यः । अनेन काश्यपसंहितातन्त्रमनायासात् यक्षाल्लब्धं तत्पुनः संस्कृतम्** ( का संहिताकल्प. २५.२७ )
वृद्धजीवकाच्या वंशातील पुरुष; याला काश्यपसंहिता तंत्र अनायास नामक यक्षाकडून मिळाले. ते पुन्हा सुधारून त्यावर याने संस्कार केले,

**–प्रतिसंस्कृत**–वि., वात्स्यकृतप्रतिसंस्करणयुक्तम् । यथा वृद्ध-जीवकीयं तन्त्रम् ( काइ. )
वात्स्याने केलेले प्रतिसंस्करण युक्त जसे वृद्धजीवकाचे तंत्र (शास्त्र)

**वाद्**–पु., परेण सह विगृह्य शास्त्रोपस्कृतं कथनम् बुभुत्सोः कथा वाहः ( चवि. ८.२८ )
तत्त्वज्ञाला अडवून त्याच्याशी तत्व जाणण्याच्या हेतूने शास्त्रोक्त विषयावर चर्चा करणे. तत्वजिज्ञासूंचा उहापोहात्मक विचारविनिमय.

**–मर्यादा**–स्त्री., वादव्यवस्था, वादे इदं वाच्यमिदमवाच्यमेवं सति पराजितो भवतीत्येवंरूपा व्यवस्था ( चवि. ८.२६ )
" हे बोलणे योग्य हे अयोग्य अशा रितीने ( वादी किंवा प्रतिवादी ) पराजित होतो " असे हे त्यातील वादमर्यादेचे लक्षण आहे. ( असा हा ) वाद जो वैद्यांमध्ये चालतो तो आयुर्वेदाविषयीच चालावा, अन्याविषयी नव्हे. प्रतिपाद्य सर्व विषयांमध्ये या वादात भाषण व प्रतिभाषण यांचे विस्तार आणि केवळ उपपत्तीच असतात; त्या सर्व नीट पाहून ( समग्र पाहून ) सर्व वाक्य बोलावे. अप्रस्तुत, शास्त्रबाह्य, परीक्षा न केलेले, निर्णयास अनुपयुक्त, गुंतागुंतीचे आणि अपूर्ण बोलू नये. सर्व युक्तियुक्त ( हेतुसहित ) बोलावे. दोषरहित, हेतुयुक्त, सगळेच वादसंग्राम चिकित्सेमध्ये उपयुक्त ठरतात. कारण त्यामुळे बुद्धि व्यापक बनते; दोषरहित बुद्धि सर्व कार्याची सिद्धीहि प्राप्त करून देते.

**–मार्ग**–पु., वादपद्धति ( चवि. ८.२७ )
वादाची पद्धत.

**–मार्गपद्**–न., वादे मार्गदर्शकं पदम् । वादस्य मार्गः वादपद्धतिः, तत्रोपयुक्तं पदम् ( चवि. ८.६६ )
वादात मार्गदर्शन करणारे स्थान. वादाचा मार्ग म्हणजे वादाची पद्धति. तेथे उपयुक्त असे स्थान.

**–विग्रह**–वि., वादो विग्रहः शरीरमिव यस्य सः जल्पो वितण्डा वा ( चवि. ८.६७ )
वितंड वाद, भांडण हेच ज्याचे स्वरूप असा.

**–संघट्ट**–पु., वादेऽन्योन्य पीडको मेलकः वादसंघर्षः ( चसू. २५.२८ )
वादातील गोंधळ टाकून देऊन मनामध्ये अनुसंधान (चिंतन) करावे. अंधकार समुदाय नष्ट केल्याशिवाय ज्ञेय विषयाचे ज्ञान होत नाही,

**वादनीय**-पु., वनस्पति० **वंशभेदः, रन्ध्रवंशः** द्र० '**वंश**' ( रा. ७.२१६, पृ. १६२ )
बांबू– वेळूचा प्रकार, पोकळ वेळू.

**वादित्र**-न., **वाद्यम् । यथा मृदङ्गादि** (सुचि. २४.१०१) **एतच्छब्देन विषभुक्तो नाम विषजुष्टो निर्विषतां याति** ( असंसू. ८ )
वाद्य. जसे मृदंग इत्यादी. या वाद्यांच्या आवाजाने विषाची बाधा झालेला विषमुक्त होतो.
**-क्रिया**-स्त्री., **वाद्यवादनम्** ( असंसू. ३ )
वाद्य वाजवणे.

**वादूल**-पु., प्राणि० **चर्मचटी । तस्य मांसरसपानं वातशामकम्** ( काखि. १०.११३ )
पाकोळी. तिच्या मांसरसाचे पान वातशामक आहे.

**वाद्य**-न., **वादित्रम् । भेरीपटहादीनि वाद्यानि** ( सुक. ३.१४-१५ )
वाद्य. भेरी मृदंग इत्यादी वाद्ये.

**वाध्रीणस**-पु., प्राणि० **बिडालभेदः, जाहकम्** ( इन्दु. असंउ. १ )
मांजराचा एक प्रकार.

**वानप्रस्थ**-पु., वनस्पति० **मधुकः** (ध. ५.४५; पृ. १७७)
ज्येष्ठमध.

**वानर**-पु., प्रसहप्राणी० ( अहृसू. ६.४८ ) **पर्णमृगवर्गीयः** ( सुसू. ४६.७६ ) **वानं वनसम्बन्धि फलादिकं राति गृह्णाति इति, कपिः** ( चसू. २७.३५ ) **सविषमन्नं दृष्ट्वा वानरः शकृन्मुञ्चति** ( अहृसू. ७.१७ ) **स दंष्ट्रानखविषः** ( **सुक. ३.५** )
माकड. पाने खाणाऱ्या वर्गातील प्राणी वान म्हणजे वनसंबंधी फळे इत्यादी राति म्हणजे घेतो तो वानर. विषारी अन्न पहाताच वानराला शौचास होते. त्याच्या नख व दाढ यांत विष असते.

**( वानरी )**-स्त्री., वनस्पति० **कपिकच्छूः** ( र. ३०-४७ )
खाजकुहिली.

**वानसी**-स्त्री. देश० **कुरुक्षेत्रस्य दक्षिणदिग्भागे अयं देशविशेषः स्यादिति उन्नीतम्** ( काखि. २५.१३ )
कुरुक्षेत्राच्या दक्षिण दिशेला हा देश आहे.

**वानस्पत्य**-पु., औद्भिद० **चतुर्विधौद्भिदेष्वेकम्, पुष्पैः फलैर्युक्तः वानस्पत्यः.** ( चसू. १.७१-७२ ) **पुष्पफलवान्वृक्षः** ( चक. १.८ )
चार प्रकारच्या औषधींपैकी एक. फुले व फळे दोन्ही येणारी, फळफुलांनी युक्त वृक्ष.

न., **सत्वभेद० तामससत्वस्य एको भेदः** ( चशा. ४.३९-(३) )
तामस मनाच्या प्रकारातील एक.
वि., **तामससत्वयुक्तः । यथा नरः** ( सुशा. ४.९७ )
तामस मनोवृत्तीचा. आळस, केवळ, खाण्यापिण्याकडेच मनाची प्रवृत्ति, बुद्धीच्या कोणत्याही अंगाचा विकास न झालेला तामसप्रकृतीचा (मनुष्य).
**-काय**-पु.,तामसकाय० **लक्षणम्–यस्मिन्नरे एकस्थानरतित्वम्, नित्यम् आहारे एव रतिः, सत्वधर्मकामार्थवर्जितत्वम् इत्येवमादिगुणाः दृश्यन्ते स वानस्पत्यकायो ज्ञेयः** ( सुशा. ४.९७ )
तामस शरीर लक्षण–जो एके ठिकाणी बसून रहातो, नेहमी आहारातच गोडी असलेला; सात्विकता, धर्म, काम, अर्थ हे ज्याला माहीत नाही, यांचे कडे ज्याची प्रवृत्ति नाही, इत्यादी गुणांचा. वनस्पती प्रकृतीचा.

**वानीर**-पु., वनस्पति० **वेतसभेदः, सुगन्धिमूलः** ( चक्र. चचि. ३.२५८ ) **असुगन्धमूलम्** (**जेज्जट**) ( चचि. ३.२५८ ) **आनूपदेशोद्भवः जलवेतसः** ( चक. १.८ ) **वृन्तपुष्पः जलवेतसः** ( रापरि. ९.१७ ) **गुणाः–तिक्तः कषायः शीतः सङ्ग्राही कफघ्नः पित्तास्रकफदोषव्रणरक्षोघ्नः** ( रापरि. ९.१७; पृ. ३६५; शालि. नि. पृ. ३४७ )
हिं.—बेंत, जलबेंत.
**म.—थोरवेत, वेत.**
गु.—नेतर.
बं.—वेत, वयसा, जलवेत.
ता.—बेट्टम्.
फा.—वेत.
जलवेतस, थोर वेत, वेत. वेतसाचा प्रकार. सुगंधि मुळाचा व सुगंध नसलेल्या मुळाचा. गुण— कडु, तुरट, थंड, मळ संग्राहक, कफनाशक, रक्तपित्त, व्रण व राक्षसबाधा नाशक.
न., वनस्पति० **उशीरभेदः, सुगन्धिमूलम् रक्तपित्ते प्रलेपार्थमुपयुक्तम्,** द्र० **'उशीर'** ( चचि. ४.१०२ )
काळ्या वाळ्याचा प्रकार. सुगंधि मुळाचा रक्तपित्तात लेप करण्यास उपयुक्त.
**-ज**-पु., वनस्पति० **मुञ्जः** (रा. ८.२०४; पृ. १६०)
मुंजा. मोळ गवत.
न., **कुष्ठम्** ( ध. ३.४९; पृ. १०५ ) कोष्ठ.

**वानेय**–न., **वनस्पति० जलमुस्तम्** (ध. १.४३ पृ. १६).
लहान नागरमोथा.

**वान्त**–वि., **वमितः** ( चचि. ८.११९; सुचि. ३३.७ )
**कृतवमनः** ( सुचि. ३९.३ )
वांती करविलेला. वांती झालेला.

**वान्ताद**–पु., **प्राणि० वान्तमत्तीति । प्रसहजातीयः प्राणिविशेषः, कुक्कुरः** (चसू. २७.३६)
**गुहाशयवर्गीयः** ( ड. सुसू. ४६.७२ ) **श्वा** ( अरु. अहसू. ६.४९ )
वांती खाणारा कुत्रा. आक्रमक प्राणी, गुहेत राहणारा प्राणी.

**वाप**–पु., **आवापहः, प्रतीवापः, द्रव्ये द्रव्यान्तरप्रक्षेपणम्** ( र. ८.४६ )
द्रव्यात द्रव्य घालणे, वितळलेल्या धातूत अन्य द्रव्य घालणे. त्यालाच आवाप, प्रतीवाप, आच्छादन म्हणतात.

**(वापी)**–स्त्री., **जलाशय० कूपभेदः** ( चसू. २७.२१४ )
**इष्टकाभिर्बद्धा ससोपानतीर्था 'पुष्करिणी' ति लोके** ( ड. सुसू. ४५.४ ) **पाषाणादिबद्धा ससोपाना स्वल्प जलाधारिका** ( सुउ. ६४.४१-४३ ) **नववारिपूर्णा निःसारितपूर्वपानीया हृतमला निर्मलजलभृता । मद्यदाहशमनार्थं अवगाहनाय प्रशस्ता** ( सुउ. ४७.५८-५९ ) **वापीजलगुणाः–मधुरं लघु च** ( असंसू. ६ ) **कटु सक्षारं वातश्लेष्महरं पित्तलं च** ( सुसू. ४५.३३ )
विहीर. पायऱ्या असलेली विहीर. पुष्करिणी असे एक नाव, जुने पाणी काढून टाकून नव्या पाण्याने भरलेली निर्मळ पाण्याची विहीर. मद्य प्याल्याने झालेल्या दाहाचा नाश व्हावा म्हणून स्नानाकरिता प्रशस्त. **गुण**—गोड, हलके, तिखट, क्षारयुक्त, वातकफनाशक, पित्तवर्धक.

**वापन**–न., (परिव०) **कर्म० मुण्डनम्** ( सुचि. २९.१२ )
मुंडन. मुंडन करणे, केशवपन.

**वाप्य**–न., **वनस्पति० कुष्ठम्** (ध. ३.४९; चचि. ७.१३०; र. २७.१०-११ पृ. १०५)
कोष्ट. कोळींजन.
वि., **वापीभवम्** ( **जलम्** ) ( सुसू. ४५.३३ )
विहिरीतले पाणी.

**वामक**–पु., **नृप० काशिपतिः** ( चसि. ११.५; चसू. २५.५ )
एक राजा. काशीचा राजा.

**वामदेव**–पु., **ऋषि० रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः** ( चसू. १.९ )
रोगनाशक उपचारांच्या विचारविनिमयाकरिता हिमालयाच्या उतरणीवर एकत्र आलेल्या महर्षींतील एक.
**ऋषि० अयं हिमालये इन्द्रादेशाद्रसायनप्रयोगं कृतवान्** ( चचि. १.(४).३ )
एक ऋषि. याने इंद्राच्या आदेशाने हिमालयात रसायन प्रयोग केला.

**वामदेव्य**–वि., **वामदेवेन इष्टम् यथा–साम** ( का जातिसूत्रीय शा. ८ )
वामदेवाने गाइलेला. जसे सामवेदमंत्र.

**वामन**–वि., **ह्रस्वाकृतिः** ( चशा. ३.१५; असंशा. २ )
**अत्यन्तह्रस्वशरीरः** ( सुसू. २४.५ )
**वामनापत्यत्वं दौहृदविमानजन्यम्** ( सुशा. ३.१८ )
खुजा. शरिराने बुटका. अति लहान शरिराचा. डोहाळे न पुरविल्यामुळे असा दोषयुक्त बालक होतो.
**–त्व**–न., **रोग० अशीतिवातविकारेष्वेकः अतिह्रस्वदेहत्वम्** ( चसू. २०.११; असंसू. २० )
ऐशी वात विकारांपैकी एक. अति लहान शरिराचा.

**वामनीय**–वि., **वमनकरम्। यथा मदनादि** ( सुचि. ८.२५ )
वांती करणारे. जसे गेळफळ वगैरे.

**वामपार्श्व**–पु., **शारीर० उदरोरसोः वामभागः** ( सुसू. ४६.४८७ )
पोट व छाती यांचा डावीकडचा भाग.
**आसन० बस्त्यर्थमुपयुक्तः** ( अहसू. १९.२३ )
बस्तीसाठी उपयुक्त अशी शरिराची स्थिती.

**वामपार्श्वाश्रय**–वि., **वामपार्श्वाश्रितम् । वह्निग्रहणीगुदवलीमुखानिवामपार्श्वाश्रितानि तत्पार्श्वशायिनस्तानि निम्नानि भवन्ति** ( असंसू. २८ )
डाव्या कुशीत आश्रय असलेले. अग्नि, ग्रहणी, गुदाच्या वळीची तोंडे, डाव्या कुशीत आश्रय करून आहेत. त्या कुशीवर निजल्याने ती खालच्या बाजूला येतात.

**वामाचार**–वि. **विपरीतव्यवहारवान् । यथा–गर्हितदूतः** ( सुसू. २९.९-१५ )
विपरीत व्यवहार करणारा दूत. अनिष्टसूचक दूत.

**वामावर्ता**–स्त्री., **वनस्पति० आवर्तकी** (रा.३.२९७,पृ.४७)
चांभारआवळी.

**वामिन्**-वि., वामकम्, यथा-मदनवचादि (र. ५.४९) वामक, वांती करणारे गेळफळ वेखंड इत्यादी.

**( वामिनी )**-स्त्री., रोग० विंशतियोनिव्यापत्सु एका ( चसू. १९.४ (९) ) सम्प्राप्तिः लक्षणं च-निषिक्तं शुक्रं गर्भाशयात्सरुजं नीरुजं वा मरुत् षडहात्सप्तरात्राद्वा बहिर्निरस्येत् ( चचि. ३०.३३-३४; असंउ ३८ ) याऽऽर्तवमिश्रं सवातं शुक्रमुद्वमति दाहपाकादियुता च सा वामिनी योनिः ( सुउ. ३८.१२ )
वीस योनिविकारांतील एक. संप्राप्तिलक्षण-संभोगात पडलेले शुक्र गर्भाशयातून वेदनायुक्त किंवा वेदना न होता वायु सहा दिवसात बाहेर काढून टाकतो, अशी योनी. जी आर्तव मिश्र सवात शुक्र ओकते व आग पिकणे इ० चिन्हे होतात, त्या योनीला वामिनी असे म्हटले आहे.

**वाम्य**-वि., वमनार्हम् । अवाम्यं वमनाऽनर्हम् । वाम्याः-विष-शोष-स्तन्य दोष- मन्दाग्नि- उन्माद-अपस्मार-श्लीपद-अर्बुद-विदारिका-मेदो- मेह-गर-ज्वर-अरुचि-अपची-आमातीसार- हृद्रोग- चित्तविभ्रम-विसर्प-विद्रधि-अजीर्ण- मुखप्रसेक-हल्लास -श्वास-कास-पीनस-पूतीनास- कण्ठौष्ठवक्त्रपाक-कर्णस्राव-अधिजिह्वा-उपजिह्विका-गलशुण्डिका अधोगरक्तपित्त-कफस्थानजाः विकाराः ( सुचि. ३३.१८ चसि. २.१० )
वांती देणे आवश्यक आहे असे रोगी. विष, शोष, अंगावरच्या दुधातील दोष, मंदाग्नि, उन्माद, अपस्मार, हत्तीपाय, घातक अवाळू, हातापायांना चिरण्या, मेद, प्रमेह, कृत्रिम विष, ज्वर, रुचिनाश, जुनाट गंडमाळा, आमातिसार, हृद्रोग, चित्तभ्रंश, धावरे, गळू, अजीर्ण, तोंडाला पाणी सुटणे, घशात येणे, श्वास, खोकला, पडसे नाकात पू होणे, घसा, ओठ, तोंड येणे, कानाचास्राव, जिभेच्या वर व खाली विकार होणे, पडजीभ, गुद योनिमूत्र द्वाराने रक्तस्राव, कफस्थानातील विकार.
**अवाम्याः-वमनानर्हाः-पुष्पिणी-ऋतुमती-कुटीगता-गर्भिणी-अल्पक्षीरा-लघुक्षीरा क्षीरच्छर्दनपुत्रा-प्रच्छर्दिनी-सुभगा पण्डितमानिनी-जाठरी-वातज्वरी-स्थूलः अक्षिरोगी-तृष्णालुः-मूर्च्छावान् निरूढानुवासितौ-क्षतक्षीणः-अतिबालः अतिवृद्धः-गुल्म-प्लीहोर्ध्वरक्तपित्तलोमव्यापत्कर्णरोगशिरःकम्पार्दिताः**



**-अर्धावभेदक- सूर्यावर्त- रेवतीपौण्डरीक- शकुनिपूतनामुखमण्डिकार्ताश्च इत्येते न वाम्याः** ( कासि. ७; चसि. २.८ )
वांती देता येत नाही असे रोगी. विटाळशी ऋतुमती, बाळंतीण होणारी, थोडे दूध किंवा हलके दूध असलेली, अंगावरच्या दुधाची ओकारी होत असलेले बालक असलेली स्त्री, ओकणारी (वांत्या होत असलेली) भाग्यवान, स्वतःला पंडिता समजणारी, उदर झालेली, वातज्वर असलेली, स्थूल, डोळयाचे रोग, तहान, मूर्च्छा, उरःक्षताने क्षीण, शोधक व स्नेहबस्ति घेतलेला, तान्हे मूल, अतिवृद्ध, गुल्म, प्लीहा, वरचे रक्तपित्त, केसांचे विकार, कान, डोके, यांचे रोग; कंप, अर्दित असलेला, अर्धे डोके दुखत असलेला, सूर्याच्या गतीबरोबर वाढणारी, व कमी होणारी डोकेदुखी असलेला, रेवती, प्रपौंडरिक, इत्यादी ग्रहांनी पीडित यांना वांतीचे औषध देऊ नये

**वायवाल**-न., रत्न० गारुत्मतम् (ध. ६.४९; पृ. २१६) पाच, पाचू.

**वायवी**-स्त्री., छाया० रूक्षा श्यावारुणा हतप्रभा छाया वायवी ज्ञेया। सा अकस्मादुत्पन्ना विनाशाय, सहजा तु क्लेशाय कल्पते ( चइ. ७.११-१३ )
एक छाया. रूक्ष, काळी, तांबुस, प्रभाहीन, छाया वायूची. ती एकदम उत्पन्न झाली तर मृत्युदायक. ती जन्माबरोबर असेल तर क्लेशकारक होते.

**वायवीय**-त्री., वायुगुणभूयिष्ठं ( द्रव्यं कर्म वा ) ( चशा. ७.१६; सुसू.४१.४(४) ) द्र०'वायव्यद्रव्यम्' वायुगुण अधिक असलेले द्रव्य किंवा कर्म.

**वायव्य**-वि., वायवीयम्, वातजः ( रोगादिः ) ( चनि. १.४ ) यथा गुणाः-वायव्यास्तु स्पर्शः स्पर्शनेन्द्रियं सर्वचेष्टासमूहः सर्वशरीरस्पन्दनं लघुता च ( सुशा. १,१९ )
वातज. जसे रोग. वातज **गुण**-स्पर्श, स्पर्शनेंद्रिय (त्वचा) सर्व चेष्टासमूह, सर्व शरिरातील स्पंदन-हालचाल व हलकेपणा.

**( वायव्या )**-स्त्री., वनस्पति० करञ्जभेदः अङ्गारवल्लिका ( ध. ५.११०; पृ. १९१ )
करंजप्रकार.

**-द्रव्य**-न., पाञ्चभौतिकमपि वायुगुणभूयिष्ठं द्रव्यम्। वायव्यद्रव्यस्य गुणाः- लघुशीतरूक्षखरविशदसूक्ष्मस्पर्शगुणबहुलम्; तत्कर्म-रौक्ष्यग्लानिविचारवैशद्यलाघवकरम् ( चसू. २६.११; अहसू. ९.८ )

पंचमहाभूतांचे पण वातगुणांचे आधिक्य असलेले द्रव्य. **गुण**—हलके, थंड, रूक्ष, खरखरीत, स्वच्छ, सूक्ष्म स्पर्शगुणाचे आधिक्य. कर्म—रूक्षता, ग्लानि, विविध चेष्टा, स्वच्छता हलकेपणा करणे.

**-मर्मन**-न., यत्र मर्मसु वातः भूयस्त्वेन अवतिष्ठते । तद्विशेषः- शल्यमुखावरुद्धो यावदन्तर्वायुस्तिष्ठति तावज्जीवति । उद्धृतमात्रे तु शल्ये मर्मस्थानाश्रितो वायुः निष्क्रामति तस्मात्सशल्यो जीवति , उद्धृत-शल्यो म्रियते । पाकात्पतितशल्यो वा जीवति (सुशा. ६.१६)
वायव्य मर्म म्हणजे ज्या मर्मांच्या मध्ये आधिक्याने वात राहतो ते मर्म. **त्याचे वैशिष्ट्य** आत घुसलेल्या शल्यामुळे व्रणाचे मुख बंद असते, वायु आत राहतो व तोपर्यंतच मनुष्य जगतो. ते शल्य काढताच वायु मर्मस्थानातून बाहेर निघतो व मनुष्य मरतो. पण व्रण पिकून शल्य आपोआप बाहेर पडले तर तो जगतो.

**वायस**-पु., पक्षि० प्रसहवर्गीयः (सुसू. ४६.७५ अहृसू. ६.४९) वय एव वायसः। वयते वा (चसू. २७.३६)
कावळा.

**(वायसी)**-स्त्री., वनस्पति० काकमाची (चक्र. चचि. १२.६३; सुचि. ९.२९; र. ३०.४७ ध. ४.२१; पृ. १३८) कावळी.
**काकादनी** (रा. ३.४४; पृ. १३९) कावळी.
**काकनासा** (रा. ३.४०; पृ. १३९) कावळी.
**काकजङ्घा** (रा. ४.३८. पृ. १३९) कावळी.
**काकोदुम्बरिका** (इन्दु. असंउ. ४४)
काळा उंबर, खर्वती.
**काकतिक्ता** (सुचि. ९.२९) गुंज.
तेजोवती (रा. ३.३९३; पृ. ६१) मालकांगोणी.
**शाक० काकमाचीशाकम्** (असंचि. ४)
कावळी भाजी.

**-तुण्ड**-पु., अस्थिसन्धिभेद० वायसतुण्डाकृतिः सन्धिः । यथा हनुसन्धिः (सुशा. ५.२७; असंशा. ५)
हाडाच्या सांध्याचा प्रकार. कावळ्याच्या चोचीसारखा सांधा. जसे हनुवटीचा सांधा.

**-पीलुक**-पु., वनस्पति० काकाण्डः, काकनन्दी । सैव वायसपीलुक इति जज्जटः (चचि. २३.२१७)
**गुञ्जा** (इन्दु. असंउ, ४३) गुंज.

**वायसादनी**-स्त्री., वनस्पति० तेजोवती (रा. ३.३९३; पृ. ६१)
मालकांगोणी.
**काकादनी** (रा. ३.४३; पृ. १३९) कावळी.

**वायसाह्वा**-स्त्री., वनस्पति० काकमाची (रा. ४.२५; पृ. १३८) कावळी.
**काकनासा** (रा. ३.४१; पृ. १३९) कावळी.

**(वायसी)-शाक**-न., शाक० काकमाचीशाकम् (असंचि. ४) कावळी भाजी.

**वायसेक्षुक**-पु., वनस्पति० काशः (ध. ४.१३०; पृ. १६०) कासदर्भ.

**वायसोलिका**-स्त्री., वनस्पति० काकोली (रा. ३.१६६; पृ. ३१)
कावळी. अष्टवर्गापैकी एक.

**वायसोली**-स्त्री., वनस्पति० काकोली (ध. १.१३२; पृ. ३१)
कावळी, अष्टवर्गापैकी एक.

**वायु**-पु., वातः (चचि. २८.१४; चचि. ३०.२३; सुशा. ३.४) केवलवायुः अनावृतवातः । केवलं वायुमुद्दिश्य केचिद्गदाः वेपथ्वादय उक्ताः । तथा चावृतं वातमुद्दिश्य केचिद्गदाः (चक्र. चचि. २८.१४) पित्तसम्मूर्च्छितो वायुः पित्तेन सह एकतां प्राप्तः दाहादीन् करोति (चचि. ३०.२३)
वात. वायु. वायु म्हणजे आवरण नसलेला वातदोष. कंप वगैरे विकार केवळ वाताचेच आहेत. तसेच आवृत वाताचेही काही विकार सांगितले आहेत. वायु योगवाही असल्यामुळे तो पित्तयुक्त झाल्यास त्याच्याशी एकरूप होतो. व दाहादि विकार करतो.

**-कोण**-पु., वायव्यदिक्कोणः, रसशालायाः वायव्ये कोणे शोषणकर्म करणीयम् (र. ७.३-४)
वायव्यदिशेचा कोपरा. रसशाळेत वायव्यदिशेच्या भागात ओषधे सुकवावीत.

**-कोप**-पु., वातप्रकोपः (असंसू. ३५)
वाताचा प्रकोप.

**-चय**-पु., वातस्य सञ्चयः ग्रीष्मजातः (अहृसू. १२.२४)
वाताचा संचय (ग्रीष्मऋतूत होतो.)

**-धातु**-पु., दोष० वात एव । शरीरधारकः वायवीयः शारीरभावः (चवि. ८.१२२)
वातधातु, धातुरूप वात, शरिराचे धारण करणारे वातघटक, वातगुणी शारीरभाव,

**-निर्वाहिन्**-वि., व्रण० यस्माद्वायुर्बहिर्निर्गच्छति, सः ( असंसू. ३८ ) वायुनिर्गमद्वारभूतः ( अहृसू. २९.५२ )
वायु निघणारा व्रण. ज्याच्यातून वात बाहेर निघतो तो व्रण. वायु निघण्याचे दार झालेला.

**-परमाणु**-पु., वायोरत्यन्तः सूक्ष्मो विभागः ( काजातिसूत्रीयशा. ३ )
वायूचा अत्यंत सूक्ष्म विभाग.

**-पिण्डक**-पु., नपुंसक० वातपिण्डकः । यदा पुंगर्भस्य वाय्वग्निदोषाद्वृषणनाशस्तदा वायुपिण्डकाख्यो नपुंसको भवति ( असंशा. २ )
एक प्रकारचा नपुंसक. पुरुष गर्भाचा वात पित्त दोषांनी वृषणाचा नाश होतो तो नपुंसक.

**-प्रकोप**-पु., वातप्रकोपः वर्षासु वातः प्रकुप्यति ( अहृसू. १२.२४ )
वाताचा प्रकोप. वर्षाऋतूत वायु प्रकुपित होतो.

**-प्रशम**-पु., वातस्य शमनम्, शरदि वातस्य शमनं भवति ( अहृसू. १२.२४ )
वाताचे शमन. शरदऋतूत वाताचे शमन होते.

**वाय्वात्मक**-वि.. वायुरूपम्, वायवीयम् । यथा-स्पर्शनम् ( चशा. ४.१२ )
वायुरूप, वातात्मक, वाताचे, जसे- स्पर्श, स्पर्शनेंद्रिय.

**वाय्वामय**-पु., वातरोगः ( अहृसू. १८.२६ ) वातरोग.

**वार्**-न., जलम् ( रा. १४.३१८; पृ. २५८ ) पाणी, जल.

**वारङ्ग**-न., शस्त्रनालम् ( सुसू. २७.१२ ) शस्त्राची मूठ. ग्रहणस्थलम् यथा स्वस्तिकयन्त्रस्य ( सुसू. ७.१० ) शस्त्र धरण्याची जागा.
शस्त्रमस्तके शिखाकारोऽवयवः ( अहृसू. २८.२९ ) शस्त्राच्या डोक्यावरचा शेंडीसारखा अवयव.

**वारड**-पु., पक्षि० विष्किरजातीयोऽयम् (चसू. २७.४९) द्र० ' विष्किर ' हंस.

**वारण**-पु., प्राणि० गजः ( असंचि. ९; अहृसू. ६.५० ) हत्ती.
न., निवारणोपायः ( सुचि. २७.५ )
निवारण करण्याचा उपाय.

**-काष्ठ**-न., पुन्नागकाष्ठम्, वरुणकाष्ठम्, सूतिकागारार्थमुपयुज्यते । ( चशा. ८.३३ )
पुन्नागाचे लाकूड. वायवर्ण्याचे लाकूड, बाळंतिणीच्या खोलीसाठी उपयुक्त.

**-केशर**-न., वनस्पति० नागकेशरम् (सुउ. ५०.२३) नागकेशर.

**-मौक्तिक**-न., वारणस्य मस्तकोद्भूतं मौक्तिकम् ( असंउ. ४२ )
हत्तीच्या डोक्यात होणारा मोती.

**वारणक**-पु., वनस्पति० करञ्जभेदः कण्टकीकरञ्जकः द्र० 'करञ्ज' ( अहृसू. १७.७ )
करंजाचा प्रकार, काटेकरंज.

**वारपत्नी**-स्त्री., वनस्पति० धरणीकन्दः (रापरि. ७.४२; पृ. ३५० ) लांबट रानकंद.

**वाराह**-वि., वराहसम्बन्धी यथा वाराहरसः, वराहस्य मांसरसः ( चसू. १३.८३ )
डुक्करासंबंधी, डुक्कराचे मांस, मांसरस.

**-कर्णी**-स्त्री., वनस्पति० अश्वगन्धा ( ध. १.२७२; पृ. ६२ ) आसकंद.

**-पित्त**-न., भैषज्य० वराहस्येदमिति वाराहम्, वराहस्य पित्तम् ( चचि. ३०.७१ ) डुक्कराचे पित्त.

**-पुट**-न., पुट० वराहसंज्ञितं पुटम्; तच्च अरत्निमात्रनिम्नविस्तारे चतुरस्रे खाते दीयमानं पुटम् ( र. १०.५४-५५; र. २.४१-४२ )
वराह नावाचे पुट. हाताला थोडे कमी लांबी रुंदी उंचीच्या चौकोनी खड्डयात दिले जाणारे पुट.

**-मदन**-पु., वनस्पति० महापिण्डीतक-स्निग्धपिण्डीतकभेदाद्विविधः । गुणाः-कटुः तिक्तः छर्दनः पक्वामाशयशोधनः कफरोगहृद्रोगहरः ( रा. ८.२८; पृ. ३५९ )
मोठ्या फळाचा काळा मोठा वृक्ष. प्रकार दोन, एक मोठा व एक स्निग्ध. गुण-तिखट, कडू, कफरोग हृद्रोग नाशक, पक्वाशय शुद्धिकर व ओकारी कारक.

**वाराहिकंद**-पु., वाराही ( सु. चि. १७.३६ )
डुक्करकंद.

**वाराही**-स्त्री., कन्द० महाकन्दशाकम् (सुचि. ७.१०; र. १२.१२५) डुक्कर कंदाची भाजी. वाराहीकन्द, डुक्कर कंद.
महौषधि० सोमसमवीर्या । तस्याः प्राप्तिस्थानम्-काश्मीरस्थं क्षुद्रकमानसं सरः । तत्र वसन्ततौ दृश्यते 'वसन्ते कृष्णसर्पाख्या गोनसी च प्रदृश्यते' ( सुचि. ३०.५; सुचि. ३०.३२-३४)
**एक महौषधि**- सोमासारखी वीर्यवान औषधी. काश्मीर मधील लहान मानससरोवराजवळ वसंत ऋतूत ती आढळते.

**वाराही**–स्त्री., कन्द० गृष्टिकाकन्दः । गुणाः–तिक्तः कटुः शीतः हृद्यो बल्यः रसायनो वृष्यः कफपित्तघ्नः कुष्ठक्रिमिगरविषमेहघ्नः ( ध. ४.९२; पृ. १५२ )
हिं.—गेंठी, भिर्वोलीकन्द.
म.—डुकरकन्द.
गु.—वाराहीकन्द, सुअरिआ, सालीवणावेल्य.
बं.—चामालु, चुवडिआलु.
डुक्करकंद. गृष्टिकाकंद. गुण– कडु, तिखट, थंड, हृदय शुक्र यांना हितकर, कफपित्तनाशक, बलवर्धक, विशुद्ध रसादिधातुवर्धक, विष–कुष्ठ–क्रमि–क्त्रिम विष–प्रमेह नाशक.

**–मूल**–न., वाराहीकन्दः ( वाराही ) (सुचि. २७.११) वाराहीमूलरसायनम्–वाराहीकन्दकल्कं क्षीरचतुर्गुणं घृतद्रोणं पचेत् । अनेन क्रमेण शतपाकं घृतं द्रोणसंमितमुपयुज्य वर्षशतायुर्भवति । अन्ये पुनः अनुक्तं जलमेव चतुर्गुणमाहुः । यद्यपि स्नेहपानानन्तरं स्नेहभोजनं निषिद्धं तथाप्यत्र वाराह्या शतपाकसंस्कृतस्य स्वभावतः शमनीयरूपस्य सर्पिषः पानाऽनन्तरं रसायनविधिना सर्पिषा भोजनं युज्यते इति न दोषः ( ड. सुचि. २७.११ ) डुक्करकंद विशुद्ध रसादि धातु वाढविणारा प्रयोग. डुक्करकंदाची चटणी. डुक्करकंदाच्या मुळापासून केलेले रसायन. विधि– डुक्करकंदाचा कल्क चौपट दूध यातून एक द्रोण पर्यंत ( २१६ तोळे ) तूप पचवावे. या क्रमाने हे घृत शंभर वेळा पुनः पुन्हा तयार करावे. याच्या सेवनाने मनुष्य शतायुषी होतो. या घृत सेवनानंतर स्नेहयुक्त भोजन निषिद्ध नाही.

**वारि**–न., द्रव्य० जलम् ( ध. ६.३०२ पृ. २५५ ) पाणी.
वनस्पति० वालकम् ( ध. १.४७; र. २१.१९० पृ. १६ ) वाळा.
कल्प० क्वाथः । यथा त्रिफलावारि त्रिफलाक्वाथः ( सुचि. ५.४२ )
काढा. जसे त्रिफळेचे पाणी, त्रिफळ्याचा काढा.

**–कोष्ठ**–न., पाषाणादिविरचितं कुशूलाकारं जलपात्रम्; तदिदम् अवगाहार्थमुपयुक्तम् ( सुउ. ६४.२५ )
पाण्यासाठी बांधलेला दगडाचा वा अन्य हौद. कोठीसारखे पाणी साठविण्याचे पात्र. पाण्यात बसण्याकरिता उपयुक्त.

**–ज**–न., वनस्पति० कमलम्, रक्तपद्मम् ( चचि. ४.१०४ )
कमळ, तांबडे कमळ.
लवण० द्रौणेयम् ( द्रोणीलवणम् ) ( रा. ६.४९ पृ. ७६ )
मीठप्रकार.
वि., जलोद्भवम् । यथा जलोद्भवानां मांसम् ( अहसू. १७.८ )
पाण्यात उत्पन्न झालेल्या जलचर प्राण्यांचे मांस.

**–तर**–वि., वारिणि जले तर्तुं शीलमस्येति वारितरम्, यथा मृतं लोहम् ( र. ८.२६ )
पाण्यात तरणारे. जसे मारलेले लोहभस्म.
वनस्पति० उशीरम् ( रा. १२.२६ पृ. ९७ )
काळा वाळा.

**–दा**–स्त्री., वनस्पति० मुस्ता ( रा. ६.५८ पृ. १५ )
नागरमोथा.

**–भव**–पु., भैषज्य० शङ्खः ( ध. ३.१७९ पृ. १३० )
पाण्यात होणारा. शंख.
न., खनिज० स्रोतोञ्जनम् ( रा. १३.२२६ पृ. १२७ )
सुरमाप्रकार.

**–रुह**–न., वनस्पति०रक्तपद्मम् ( रा. १०.२४४ पृ. १६५ )
तांबडे कमळ, पाण्यात वाढणारे.

**–वल्लभा**–स्त्री., वनस्पति० विदारिका ( रा. ७.१९४ पृ. ३५ )
भुईकोहळा.

**–वाह**–पु., वनस्पति० मुस्ता ( र. २७.११७ )
नागरमोथा.

**–सम्भव**–पु., धान्य० यावनालः ( रापरि. ८.३८; पृ. ३६० )
खरखरीत पानाची नदीत होणारी वनस्पती.
न., वनस्पति० लवङ्गम् ( ध. ३.४१, पृ. १०४ )
लवंग.
खनिज० अञ्जनम् ( रा. १३.२१५; पृ. १२५ )
सुरमाप्रकार.

**–सात्म्य**–न., आहारद्रव्य० दुग्धम् ( ध. ६.१६१; पृ. २३९ ) दूध.

**वारुण**–पु., वनस्पति० वरुणः (चसू.१४.३१ ) वायवर्णा.
वि., पश्चिमदिग्देशीयः प्रतीच्यः, यथा कोणः, रसशालायाः पश्चिमे कोणे प्रक्षालनादिकं कर्म करणीयम् ( र. ७.३-४ )

पश्चिम दिशेचा. जसे– कोन ( कोपरा ) रसशाळेच्या पश्चिमकोनात औषधे धुणे इत्यादी कर्मे करावीत.

न., **जलम्** ( ध. ६.३०२; पृ. २५५ ) पाणी.

न., वि., **सत्व० शुद्धसत्वस्य प्रकारः** लक्षणम् ( सुशा. ४.८३ )

मानस प्रकृतीपैकी सत्वगुणी प्रकृतीचा एक प्रकार.

**(वारुणी)**–स्त्री., **बालग्रह० रेवत्या विंशतिनामसु एकम्** ( का बालग्रहचि ) **जातहारिण्या रेवत्या अपरंनाम** ( काक रेवती० ७ ) **सा पञ्चमेऽहनि अपत्यं विनाशयति** ( काक रेवती० ४५ )

वीस रेवतीग्रहांपैकी एक. जन्म होताच मारणाऱ्या रेवतीचे जातहारिणी हे दुसरे नाव. ती पाचव्या दिवशी बालकाला मारते.

**वनस्पति० इन्द्रवारुणी** ( रा. ३.३७२; पृ. ५८ )

इंद्रावण, कवंडळ.

**करुणी** ( रा परि. १०.२७; पृ. ३७० )

ग्रीष्मऋतूत येणाऱ्या लाल फुलांची वनस्पती.

**श्वेतपुष्पी, नागदन्ती** ( ध. १.२५२; पृ. ५९ )

इंद्रावण, कवंडळ.

**गण्डदूर्वा, 'हरियाळी' इति ख्याता, द्र० 'दूर्वा'** ( ध. ४.१४५; पृ. १६३ ) हरळी, दूर्वा.

**आसुत०** ( ध. ६.२५५; पृ. २५१ ) **सुरा** ( सुउ. ४२.१०२ ) **प्रसन्नापर्यायः** ( अहसू. ७.४२ ) दारू.' **श्वेतसुरा सा च श्वेतपुनर्नवादिमूलयुक्तेन शालिपिष्टेन क्रियते। गुणाः–लघुस्तीक्ष्णा हृद्या शूल–कास–वमि–श्वास–विबन्ध–आध्मान–पीनसघ्नी** ( अहसू. ५.६८ ) **वातशूलशमनी** ( सुउ. ४२.१०२ )

पांढरी दारू. पांढरी पुनर्नवादि मुळे घालून तांदळाच्या पिठाची केलेली. गुण–हलकी, तीक्ष्ण, हृदयाला हितकर, शूल, खोकला, ओकारी, श्वास, अवरोध, पोटफुगी, पडसे नाशक.

**–काय**–पु., **चित्तप्रकृति० सात्विकोऽयम्** (सुशा.४.८३) **लक्षणम्–शीतसेवा, सहिष्णुत्वं पिङ्गलाक्षता पिङ्गलकेशत्वं प्रियवादित्वमित्येतानि वारुणकायलक्षणानि** ( सुशा. ४.८३ )

सात्विक प्रकृतीचा एक प्रकार. **लक्षण**–थंड द्रव्याचे सेवन, सहन करण्याचे सामर्थ्य, पिंगट डोळे व केस प्रिय बोलणे.

**–काष्ठ**–न., **पुन्नागकाष्ठम्, वरुणकाष्ठं वा** ( चशा. ८.३३ )

पुन्नागाचे लाकूड.

**–धूप**–पु., **धूपकल्प० शकुनी–पौण्डरीक–रेवती ग्रहरोगेषु प्रशस्तः** ( काक धूपकल्पा० १ )

एक धूप. शकुनी पौण्डरिक आणि रेवती ह्या ग्रहांच्या बाधेवर उपयुक्त.

**–पुष्पा**–स्त्री., **वनस्पति० विशाला ( इन्द्रवारुणी )** (असंउ. ४५ )

इद्रावण, कवंडळ.

**–वायु**–पु., **पश्चिमदिग्वायुः। 'वर्षासु ( वर्षाऋतौ ) वारुणो वायुः वाति।'** ( असंसू.४ )

पश्चिम दिशेचा वारा. वर्षाऋतूत पश्चिम दिशेचा वारा वहातो.

**–सत्वं**–वि., ( **परिव०** ) **शुद्धसत्व० 'लक्षणम्–शूरं धीरं शुचिमशुचिद्वेषिणं यज्वानमम्भोविहाररतिमक्लिष्टकर्माणं स्थानकोपप्रसादं वारुणं विद्यात्'** ( चशा. ४३७(५) )

**शुद्ध सत्वाचा प्रकार–लक्षण**—शूर, धैर्यवान्, पवित्राचरणी, अपवित्राचरणाचा तिटकारा करणारा यज्ञ करणारा, पाण्यात फार विहार करणारा कठिण कामेही सहज करणारा, योग्य ठिकाणी रागावणारा व प्रसन्न होणारा.

**( वारुणी )–प्रसाद**–पु., **वारुणी श्वेतसुरा** ( हे. अहसू. ५.६८ ) **तस्या उपरितनः स्वच्छभागः अयं यक्ष्मिणः पीनसादिलक्षणेषु उपयुक्तः** ( चचि. ८.६९ )

पांढऱ्या दारूचा वरचा स्वच्छ पातळ भाग, निवळी. ही क्षयाच्या पडसे इत्यादी लक्षणात उपयुक्त.

**–मण्ड**–पु., **वारुण्या उपरिस्थितो भागः** ( चचि. ८.१६४ )

वारुणीची निवळी. पहा 'वारुणीप्रसाद.'

**वार्क्ष**–वि., **वृक्षस्येदम् वृक्षमयं वा यथा वल्कलादि** ( सुचि. २४.१३ ) **यथा वृक्षभवं वल्कलम् व्रणबन्धनद्रव्येषूपयुक्तम्** (चचि.२५.९६) **वृक्षकाष्ठमयम्** ( अहसू. २५.२१ )

वृक्षाची साल इत्यादी. वृक्षाची साल व्रणादी बांधण्यासाठी उपयोगी.

**–पट्ट**–पु., ( **परिव०** ) **वल्कलम्। व्रणबन्धनद्रव्येषूपयुक्तम्** ( चचि. २५.९६ )

वल्कल, साल. व्रण बांधावयाच्या द्रव्यांपैकी.

**–शल्य**–न., **वृक्षकाष्ठमयं शल्यम् अनिर्हृतं तच्छल्यं रक्तं मांसं पचति क्षिप्रम्** ( सुसू. २७.१९ )

झाडाचे लाकडाचे शल्य, सल, कुसळ. हे शल्य न काढल्यास ते रक्त मांसाला पिकवते.

**वार्क्षि**–पु., ऋषि० **रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिषु एकः** ( चसू. १.१० )

एक ऋषि. रोगनाश या विषयाची चर्चा करण्याकरिता हिमालयाच्या उतरणीवर जमलेल्या ऋषींपैकी एक.

**वार्ज**–न., वनस्पति० **कमलम्, रक्तपद्मम्** ( रा. १०.२४३; पृ. १६५ )

तांबडे कमळ.

**वार्तलक्षण**–न., **आरोग्यलक्षणम् । अनिर्वेदो वार्तलक्षणानां श्रेष्ठं लक्षणम्** ( चसू. २५.४० )

आरोग्याचे लक्षण. उत्साह, उमेद हे श्रेष्ठ लक्षण.

**वार्ता**–स्त्री., रोग० **या स्त्र्याकृतिबाहुल्यात्स्त्री, स्त्री-कार्याकरणाच्च स्त्री** ( इन्दु. असंशा. २ ) **स्त्रीकराणांच शरीरबीजभागानाम् एकदेशः प्रदुष्टो भवति तदा वार्ता समुत्पद्यते** ( चशा. ४.३० )

वांझ स्त्रीचा प्रकार. स्त्रीच्या शोणितरूप शुक्र बीजातील भावी स्त्रीगर्भाच्या गर्भाशय ह्या अवयवाचा बीज भाग आणि स्त्री शरीर भागाचा स्तनादि अवयवांचा अंश दुष्ट होतो तेव्हा स्त्रीची आकृति असून स्त्रीत्व नसलेला देह जन्मास येतो. अशी ती स्त्री वांझ असते, तिला वार्ता म्हणतात.

**अवस्था** ( अहसू. २९.८० ) अवस्था.

**वार्ताक**–पु., पक्षि० **वर्तीकः वनचटकः** ( र. १८.४३ ) रानचिमणा.

फलशाक० ( चसू. २७.९७ ) **वर्तुलफलः** ( सुसू. ४६.२६९ ) **वृन्ताकपर्यायः** ( हे. अहसू. ६.७७ ) **तकारी, श्वेतवार्ताकिनी** ( इन्दु. असंउ. ४३ ) **गुणाः– स्वादु ( कटुतिक्तम् )** ( चसू. २७.१६२; असंसू. ७.१ ) **तीक्ष्णोष्णं लघु ( वृद्धं गुरु ) कटुविपाकं दीपनं शुक्रलं ( हृद्यं रुच्यं )** ( असंसू. ७ ) **वातकफघ्नम् ( वातघ्नं )** ( चसू. २७.१६२ ) **बालं कफपित्तघ्नं जीर्णं–वृद्धं सक्षारपित्तलम्** ( सुसू. ४६.२६९ ) **ज्वरहिक्का-कासघ्नम्** ( भाप्र. शाकवर्ग )

हिं.—बैंगन, भंटा, भटा.

**म.—वांगे.**

गु.—रिंगणा, रिंगणी.

बं.—वेगुनगाछ.

त.—कुठिरेकइ.

फा.—वादंगान्.

वांगे, फळभाजी, पांढरे वांगे, **गुण**—गोड, कडू, तिखट, तीक्ष्ण, उष्ण, हलके पचनानंतर तिखट, दीपक, रुचकर, हृदयाला हितकर, शुक्रवर्धक, वातकफनाशक; मोठे वांगे, जड; **बाळवांगे**—कफपित्तनाशक, जुने वांगे, क्षारयुक्त, पित्तकर, तापउचकी व खोकला नाशक.

**(वार्ताकी)**–स्त्री., फलशाक० **वार्ताकम्** (रा.७.१२७;पृ.२६) वांगे.

वनस्पति० **बृहती** ( ध. १.९३ पृ. २४ ) रिंगणी, डोरली.

**–फल**–न., फल० **वार्ताकम्** ( असंसू. १४ ) वांगे.

**वार्ताकिनी**–स्त्री., वनस्पति० **कासघ्नी कण्टकारी** ( ध. १.९८; पृ. २५ )

रिंगणी.

**वार्ताकु**–पु., फलशाक० **वार्ताकम्** ( चसि ९५८; सुचि. ४.३१ )

वांगे.

वनस्पति० **बृहती** ( सुउ. २१.५२ ) रिंगणी, डोरली.

**वार्तिक**–पु., **वार्तासु लोकश्रुतवृत्तान्तेषु विषये स्मरण-कुशलः, समस्तशास्त्रतत्त्वज्ञः** ( र. ७.२५ )

लोकात ऐकू येणाऱ्या वृत्तांत विषयात ज्याचे स्मरण उत्तम आहे असा, सर्व शास्त्रांची तत्वे जाणणारा.

**वार्तिका**–पु., पक्षि० **वार्तिकः, विष्किरवर्गीयः** ( अहसू. ६. ४४ ) **वनचटकः, स्वल्पः संघातचारी** ( सुसू. ४६.५९; चसू. २७.४७ )

रानचिमणी. लहान चिमणी. कळपाने राहणारी.

**वार्तिका**–स्त्री., फलशाक० **वार्ताकम्** (ध.१.१०१ पृ.२६) वांगे.

**वार्धक**–पु., ग्रहरोग० **वार्धकग्रहजुष्टः, लक्षणम्–यश्च पर्वत–गज–वृक्षादिभ्यः पतनाद् वार्धकेन संसृष्टो भवति, स विस्फारितनेत्रः त्वरितगतिः स्वफेनलेही निद्रालुः अति पतति अति कम्पते च। एतादृश-लक्षणो न जीवति, तस्मादसाध्यः** ( सुउ. ६०.१६ )

एक ग्रहबाधा. पर्वत हत्ती, झाड, इत्यादीं वरून पडल्यावर या ग्रहाने पछाडला तर तो **वार्धकग्रहाने पछाडला जातो. लक्षणे**—विस्फारलेल्या डोळ्याचा, स्वतःचीं लाळ चाटणारा, झोपाळू, जलद चालतो. सारखा पडतो आणि अतिशय कापतो या लक्षणांचा असा तो जगत नाही.

न., वयोवस्था० जरा ( र. २६.४ )
वयाची अवस्था, म्हातारपण.
वनस्पति० कुरी ( रा. १६.१७९; पृ. २३० )
एक गवती धान्य.

**वार्धिफेन**–न., भैषज्य० समुद्रफेनः ( ध. ६.२१७; पृ. १२६ ) समुद्र फेस.

**वार्धिभव**–न., लवण० द्रोणीलवणम् (रा. ६.४९ पृ. ७६)
मीठ प्रकार.

**वार्धेय**–न., लवण० द्रोणीलवणम् ( रा. ६.४९ पृ. ७६ )
मीठ प्रकार.

**वार्यमाण**–वि., प्रतिषिध्यमानः निवार्यमाणः यथा वार्यमाणः परगृहे न प्रविशेत् ( इन्दु. असंसू. ३ )
निषेध केलेला, मनाई केलेला, मनाई असणाऱ्याने दुसऱ्याच्या घरांत प्रवेश करू नये.

**वार्यवसेचन**–न., शीतोदकपरिषेकः, नेत्रे विलम्बिनि शिरसि वार्यसेवचनं कार्यम् ( सुउ. १९.८ )
पाणी शिंपडणे, थंड पाण्याचा परिषेक. डोके वाकवून डोळ्यावर पाणी शिंपणे.

**वार्योकस्**–स्त्री., जलकीट० जलौकाः ( सुक. ५.५९-६० )
जळू.

**वार्योविद**–पु., राजर्षिविशेषः ( चसू.२६.४)
वातगुणदोषविवेचने विवदमानानामेकतमः ( चसू. १२.८ )
यज्ञःपुरुषविषये बिवदमानानामन्यतमः ( चसू. २५.१२ )
रोगभेदे तस्य मतम् 'द्वौ रोगौ निजागन्तुश्च इति' ( कासू. २७.३ ) आयुर्वेदज्ञः ( कासि. ३ )
एक राजर्षि. वाताच्या गुण दोषांच्या विवेचनाच्या वादविवादात भाग घेणाऱ्यातील एक. पुरुषाच्या उत्पत्ती बद्दलच्या विषयात भाग घेणाऱ्यातील एक. रोग प्रकारात ह्याचे मत रोग दोन प्रकारचे निज व आगन्तु असे आहे.

**वार्ष**–वि., वृषो नाम वृषभः, वृषस्येदं वार्षम्, यथा वृषभवं मूत्रम्, अपस्मारचिकित्सायां घृते सिध्यर्थमुपयुक्तम् ( चचि. १०.२६ )
बैलाचे ते. जसे बैलाचे मूत्र. अपस्मार विकारासाठी तूप सिद्ध करण्यात उपयोगी.

**वार्षिक**–वि.,वर्षासु भवम्, यद्वा वर्षर्तौ वृष्टं तत् यथा जलम् । गुरु अभिष्यन्दि मधुरं च ( चसू. २७.२०३ )
वर्षाऋतूत होणारे किंवा वर्षाऋतून पडणारे (पाणी पाऊस ) हे पचनास जड, ओलावा अधिक निर्माण करणारे व मधुर असते.
न., वनस्पति० त्रायमाणा ( ध. १.२५४; पृ. ५९ )
त्रायमाण.

**( वार्षिकी )**–स्त्री., वनस्पति० वर्षोद्भवा ( वनमल्लिका )
गुणाः–शीता सुगन्धा हृद्या त्रिदोषघ्नी विषस्फोट-कृमि-आमहरा ( ध. ५.१३६ ) मुखपाकहरा ( शालिग्राम )
हिं.—बेला, मोतिया, घुघुरुमोतिया, वन मोगरा; मोगरा.
**म.—मोगरी, रानमोगरी, बटमोगरा, सोटई मोगरी.**
गु.—बेल्य, डोलर, जंगली चिखलयो, रान मोगरो.
बं.—बेलफुलगाछ, मल्लिकाफुलरेगाछ, मल्लिकाभेद.
ता.—मल्लिगाइ.
फा.—झाम्बक, गुले सुपाद.
**मोगरी**– थंड, सुगंधी, हृदयाला हितकर, त्रिदोष नाशक, विष, जळाल्यासारखे फोड, कृमि, आम, तोंड येणे नाहीसे करते.

**–रसायन**–न., सिद्धयोग० वर्षपर्यन्तं सेव्यं रसायनम् । तस्य सेवनेन शुभ्रकेशानां कालिमा जायते । दीर्घायुष्यं पुष्टिर्वीर्यं दिव्यदृष्टिश्च जायते ( र. २६.३२ )
एक वर्षभर सेवन करण्याचे रसायन. याच्या सेवनाने पांढरे केस काळे होतात, दीर्घायुष्य, पुष्टि, वीर्य आणि दिव्यदृष्टीची प्राप्ति होते. गंधक आणि लोहभस्म तूप मधातून त्रिफळ्याच्या काढ्याबरोबर सेवन करावयाचे असे हे रसायन आहे.

**वाल**–पु., चामरः ( असंसू. ३८; अहृसू. २९.४१ )
चामर, चवरी.

**–खिल्य**–पु., ऋषि० ( चचि. १.५४ ) रोगापहरण-चिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिषु सम्मिलिताः स्वल्पप्रमाणाः महर्षयः ( चक्र. चसू. १.१३; असंशा. १२ )
रोगनाशना संबंधी विचार करण्याकरिता हिमालयाच्या परिसरात जमलेल्या महर्षींमधील लहान देहाचे ऋषि.

**–वर्ति**–स्त्री., केशानां सन्धिग्रन्थिविरहिता वर्तिः स्रुते च मस्तुलुङ्गे वर्तिरेषा प्रवेश्यते ( असंउ. ३१ )

केसांची सांधा, गाठ विरहीत वात. डोक्याला जखम होऊन मस्तुलुंग म्हणजे मेंदूच्या अंशांचा स्राव होत असेल तर त्या जखमेत ही वात ठेवण्यास उपयुक्त.

**वालक**–न., तृण० ( चसू. ३.२९; ड. सुचि. १७.१०-१३; सुउ. ५२.२४ ) **गुणाः–तिक्तं शीतं केश्यं पित्तकफघ्नं ज्वर-विसर्प-रक्तरोग-कण्डू-कुष्ठ-दाहच्छर्दि-तृषा-अतिसार-श्वित्र-व्रणघ्नम्** ( ध. १.४७; पृ. १६ )

हिं.—खस, खसबेना.

**म.—वाळा.**

गु.—वालु.

बं.—खसखस.

ता.—वट्टिवेर.

**वाळा**— गुण – कडु, थंड, केसांना हितकर, कफपित्त नाशक, ज्वर, धावरे, रक्तरोग, कंडू, कुष्ठ, दाह, ओकारी, तहान, अतिसर, कोड, व व्रणनाशक.

**वनस्पति० उशीरम्** ( ध. ३.१४; पृ. १६ )

**सुगन्धवालकम्, नेत्रवालकम्** ( असंसू. १२. असंसू. १५ )

सुगंधी वाळा, नेत्रवाळा, काळावाळा.

**विष० कन्दविषम्। गुणाः–स्निग्धघनगुरुकर्मण्यम्** ( असंउ. ४८ )

एक विषारी कंद. **गुण**—स्निग्ध, घट्ट, जड.

**वालु**–न., **वनस्पति० वालुकम्** ( ध. १.१७८ पृ. ४१ ) वाळूक, फूट.

**वालुक**–न., **वनस्पति० एलावालुकम्** ( ध. ३.७६; पृ. १११ )

वाळूक, फूट.

**त्रपुसभेदः, गुणाः–मधुरं शीतं, गुरु, ( अपक्वम् ), लघु ( पक्वम् ), भेदि, अग्निकृत् ( पक्वम् ), रुच्यं कासपीनसकरम्** ( रा. ७.२५१ )

**रक्तपित्तघ्नम्** ( ध. १.१७८; पृ. ४१ )

हिं.—तुती फुट.

**म.—वाळुक.**

बं.—फुती.

त.—कक्रि.

काकडीचा प्रकार. वाळूक, फूट. **गुण**—गोड, थंड, जड, ( कच्चे ) हलके, ( पक्के ) मळ फोडणारे, अग्निदीपक, ( पक्के ) रुचकर, रक्तपित्तनाशक, खोकला व पडसे करते.

**विष० तद्वालुकानिभम्** ( र. २९.१६ )

वाळूसारखे दिसणारे. एक प्रकारचे विष.

**( वालुका )**–स्त्री., **सिकतगुणाः–मधुरा शीता वातघ्नी सन्ताप-श्रम-शाखाशैत्यहरा** ( धपरि. ६.१८ पृ. २९१ )

**वाळू**–गुण–गोड, थंड, वातनाशक, संताप, श्रम अवयवांची थंडी नाहींशी करणारी.

**( वालुकी )**–स्त्री., **वनस्पति० वालुकम्** ( रा. ७.२५० पृ. ४१ ) वाळूक. फूट.

**–पर्ण**–पु., **वनस्पति० अश्मन्तकः** ( ध. १.१९४ पृ. ४६ ) आपटा.

**–पुट**–न., पुट० **उपर्यधस्तस्तया वालुकया दीयमानं पुटम्** ( र. १०.६२ )

औषधी संपुटाच्या खाली व वर तापलेली वाळू घालून पुट देणे.

**–प्रक्षेपण**–न., जलशीतीकरणार्थमुदकपात्रस्य **वालुकामध्ये प्रक्षेपणम्** ( सुसू. ४५.१९ )

वाळूत ठेवणे. पाणी थंड करण्याकरिता पाण्याचे भांडे वाळूत ठेवणे.

**–यन्त्र**–न., यन्त्र० **वालुकापूरितं खर्परं यत्र वालुकामज्जितायां रसयुक्तकूपिकायाः पचनं विधीयते चुल्लिस्थेनाऽग्निना** ( र. ५.३९-४० ) **अन्तर्द्विभागरसपूरिताङ्गुलपरिमाणमृद्वस्त्रावगुण्ठितकाचकूपीपचनार्थं निर्मितं वालुकायुक्तं वितस्तिगम्भीरं कलशेनाऽऽच्छादितं भाण्डम्** ( र. ९.३६-३९ )

वाळुका यंत्र. खापरात पारायुक्त कुपी ठेवून भोंवताली वाळू भरून ते चुलीवर ठेवून अग्नीने पचन करणें. कुपीच्या तीन भागातून दोन भाग पारा घालून एक अंगुळ जाडीच्या मातकापडाने वेष्टन केलेली कुपी सर्वबाजूनी वाळू भरलेल्या पात्रात एक वीत खोल अशी ठेवल्यानंतर तयार होणारे हे वाळुकायंत्र होय.

**वालुकादिकासीस**–न., **भैषज्य० कासीसभेदः, वालुकासमानवर्णः। गुणाः– लवणाम्लमुष्णं धूमसदृशं केशरञ्जकं विषश्वित्रघ्नम्** ( र. ३.५५ )

हिराकशीचा प्रकार. वाळूसारख्या रंगाची, गुण—खारट, आंबट, उष्ण, धुरासारखी, केसांना काळा रंग देणारी, विष व कोडनाशक.

**वालुकैललवण**–न., लवण० ' वालुका सिकता ताभिर्युक्ता इला पृथिवी वालुकैला, तत्र संभवं लवणं वालुकैलम् । ' गुणाः– कटुकं छेदि
(उ. सुसू. ४६.३२१)
वालुका म्हणजे वाळू. तिने युक्त इला म्हणजे पृथिवी. वाळूने युक्त पृथिवीमध्ये उत्पन्न होणारे लवण म्हणजे मीठ ते. **गुण**—तिखट, छेदक.

**वाल्कपट्ट**–पु., वल्कलमयः पट्टः । अनग्निस्वेदार्थमुपयुक्तः
(सुचि. ४.१७)
वल्कलाचा पट्टा. अग्नीवाचून घाम आणण्यास उपयुक्त.

**वाल्मीकी**–वि., वल्मीकं पिपीलिकागृहं तस्माज्जाता वाल्मीकी मृत्तिका । सा मूषायोग्या (र. १०.६-७)
वारुळाची (माती) वल्मीक म्हणजे मुंग्यांचे वारूळ त्याची माती. ही मूस करण्यास योग्य असते.

**वाल्लभ्य**–न., वल्लभस्य भावः । प्रियत्वं, प्रियकरत्वम्
(सुचि. २६.४)
प्रियत्व, प्रियकरत्व.

**वास**–पु., निवासस्थानम्, गृहम् । यथा शरीरिणः निवासस्थानं शरीरम् (चइ. ११.२३)
निवासस्थान, घर. आत्मा ज्यात राहतो ते स्थान शरीर.

**वासक**–पु., वनस्पति० आटरूषः (ध. १.२३; पृ. ११)
अडुळसा.

**वासन**–न., संस्कार० गन्धनम् (चवि. १.२२(२))
सौगन्ध्यादिकरम् (असंसू. ७)
चटण्या वगैरेना वास–सुगंध निर्माण करणारे. सुगंधकर.
परिव० न., स्थापनम् (सुचि. २.७८)
स्थापन करणे, ठेवणे.

**(बासनी)**–स्त्री., वनस्पति० वत्सादनी
(रापरि. ३.३३; पृ. ३३२) वासनवेल.

**वासन्त**–पु., वनस्पति० बिभीतकः (ध. १.२१२;
पृ. ५०) बेहडा.
तिलकः (रा. १०.२६७; पृ. २०२) तिळवा.

**वासन्ती**–स्त्री., वनस्पति० जाती० तद्गुणाः–शीतला सुगन्धा हृद्या स्वेदनाशनी श्रमहारिणी
(ध. ५.१३९; पृ. १९८)
जाई, मोठी जाई. गुण–थंड, सुगंधी, हृदयाला हितकर, घाम व श्रम नाशक.



गणिकारी (रापरि. १०.३१)
नरवेल. वसंतऋतूत सुगंधी सोनेरी फुले येणारी पिवळी वेल.

**वासन्तकवसा**–स्त्री., भैषज्य० वासन्तः उष्ट्रकः तस्य वसा (चचि. १४.५६)
वासंतक म्हणजे उंट. उंटाची वसा, चरबी.

**वासव**–पु., इन्द्रः (असंशा. ३) इंद्र.

**वासस्**–न., वस्त्रम् (सुचि. २७.४) वस्त्र, कपडा.
वनस्पति० तमालपत्रम् (ध. २.५२; पृ. ८०)
तमालपत्र.

**(बासा)**–स्त्री., वनस्पति० आटरूषः (चसू. १४.३१; सुउ.४५.३३; असंसू.२६; अहसू.६.७७; ध.१.२३; पृ. ११) अडूळसा.

**वासुकि**–पु., सर्प० दिव्यः सर्पः (असंउ. ४१) अस्य विषमतिघोरम् (चचि. २३.१९८-१९९) निःश्वासदृष्टिविषः ये तक्षकादयस्तेऽसङ्ख्येयाः तेषु वासुकिः श्रेष्ठः ते ऽजस्रं गर्जन्ति वर्षन्ति तपन्ति च (सुक. ४.५-७) देवदानवैः समुद्रमन्थनार्थमुपयुक्तः सर्पराजः (र. ३.१७-१९)
सर्प. याचे विष अतिशय तीव्र. तक्षकादि असंख्य सर्पात वासुकी श्रेष्ठ. यांच्या निश्वास व दृष्टि यात विष असते. ते मोठ्याने गर्जना करतात तापतात व वर्षाव करतात. देवदानवानी समुद्र मंथन केले तेव्हा वासुकी उपयोगात आणला.

**वासुदेव**–पु., प्राचीनो रसाचार्यः (र. १६.६१)
प्राचीनरसशास्त्रवेत्ता.
रसरत्नसमुच्चयकर्त्रा सिंहगुप्तसूनुनाऽऽलोचिततन्त्रकर्ता (र. १.५-९)
रसरत्नसमुच्चय कर्ता सिंहगुप्त पुत्र वाग्भट याने ज्या अनेक ग्रंथ कर्त्यांचे ग्रंथ अवलोकन केले त्यांत वासुदेवाचाग्रंथही अवलोकन केला.

**(वासुदेवी)**–स्त्री., वनस्पति० शतावरी
(ध. ४.४०; पृ. ६७)
शतावरी.

**वास्तिका**–स्त्री., वनस्पति० वनमेथिका (ध. ६.११३
पृ. २३९) रानमेथी.

**वास्तु**–पु., न., अधिष्ठानम् (सुनि. १४.१३) प्रदेशः । तस्य प्रशस्तत्वम्–प्राङ्गिनम्नत्वमुदङ्निम्नत्वं कृष्णमृत्तिकत्वं सुवर्णमृत्तिकत्वमित्यादिकम् । ' प्रशस्त वास्तुनि गृहे शुचौ आतपवर्जिते । निवाते न च

**रोगाः स्युः शारीरागन्तुमानसाः ॥ '**
( सुसू. १९.३-४ )
जागा, प्रदेश, ठिकाण. पूर्वेकडे व उत्तरेकडे उतरती काळ्या किंवा पिवळ्या मातीची जागा. चांगल्या प्रशस्त मोठ्या विस्तृत अशा जागेवरच्या पवित्र व ऊन नसलेल्या निवारा असलेल्या घरात शारीर आगंतु व मानसरोग होत नाहीत.
न., **शाक० वास्तुकम्** ( रापरि. ७.६२; पृ. ३५२) चाकवत.

**–निवास**–वि., **गृहभूमिनिवासी** ( सुसू. ५.२२ )
घराच्या जमिनीवर रहाणारा ( निशाचर, राक्षस )

**–परिग्रह**–पु., **स्थानसंश्रयः** ( चसू. १७.१०४ )
स्थानात राहणे. स्थानाचा आश्रय करणे.

**–विद्या**–स्त्री., **शास्त्र० वास्तु गृहं तस्य रचनाशास्त्रम्, वास्तुशास्त्रम्** ( असंशा. ३ )
गृहरचनाशास्त्र. घरबांधणीचे शास्त्र.

**–विद्याकुशल**–पु., **वास्तुविद्यावेत्ता** ( सुसू. १५.६ )
घरे बांधण्याच्या शास्त्रांतील तज्ञ.

**–विद्याहृदय**–न., **वास्तुविद्यातत्त्वम्** ( चशा. ८.३३ )
घरे बांधण्याच्या शास्त्रांतील तत्व.

**वास्तुक**–पु., न., **पत्रशाक** ( असंचि. १०; सुसू. २०.५; सुचि. ६.८; चचि. १९.३१ ) **तस्य भेदः कङ्कवास्तुकः** ( हे. अहसू. ६.७२; ड. सुचि. ६.८; च. २७.८८ ) **शाकवर्गे श्रेष्ठः** ( सुसू. ४६.३३५ ) **गुणाः–मधुरः क्षारः** ( कटुविपाकः सुसू. ४६.२६० भाप्र. ) **सुशीतलः** ( लघुः ) ( भाप्र ) ( **दीपनंपाचनम्** ) ( भाप्र. ) **वर्चोभेदी** ( असंसू. ७ ) **रोचनः मेधावर्धनः** ( सु. ४६.२६० ) **मलमूत्रशुद्धिकृत्** ( शुक्रबलप्रदः भाप्र ) **त्रिदोषजित् ज्वरार्शोनाशनः** ( **प्लिहक्रमिहरः**) ( भाप्र. )
रापरि. ७.६२; पृ. ३५२ )
हिं.—बथुआ, बडा, बथुआ, चन्दन, बेट्ठ.
**म.—चाकवत, चकवत, चिम्बिल, चिखिल**)
गु.—बथुओ, टांको, चीलो.
बं.—ब्रेतुया, बेत्तोशाक.
ता.—परुप्पु.
फा.—मुसेलेसा, सरमक, सलमह.
चाकवत. पालेभाजी. पालेभाज्यात श्रेष्ठ. गुण–गोड, पचल्यावर तिखट, क्षारयुक्त. चांगली थंड, हलकी, दीपक, पाचक, रोचक, मळ फोडणारी, धारणशक्ति, शुक्र व बल वाढविणारी, मलमूत्र शुद्धि करणारी, त्रिदोष नाशक. ज्वर, मूळव्याध, प्लीहा, कृमिनाशक.

( **वास्तुका** )–स्त्री., **वनस्पति० चिल्ली** ( रापरि. ७.६६; पृ. ३५३. ) चिली, चील.

( **वास्तुकी** )–स्त्री., **वनस्पति० चिल्ली** ( रापरि. ७.६६; पृ. ३५३ )
चील, चिली.

**–बीज**–न., **टङ्कवास्तुकबीजम् । चूर्णमस्य रक्तपित्तशमनम्** ( सुउ. ४५.३१ )
चीलाचे बी. रक्तपित्तनाशक.

**वास्तूक**–पु., **वनस्पति० वास्तुकम्**
( सुसू. ४६.२६०; रापरि. ७.६२; पृ. ३५२)
चाकवत.

**वाह**–पु., **वाहनयोग्यः पशुः । यथाश्वादिः** ( असंसू. ३ )
वाहनास योग्य पशु. जसे घोडा, बैल इत्यादी.
**मान० द्वात्रिंशत् शूर्पाणि** ( चक. १२.९७ )
माप. बत्तीस सुपे, कुंभ किंवा चौसष्ट घट. एक लक्ष एकतीस हजार बहात्तर तोळे. ( १३१०७२ ) तोळे.

**वाहक**–पु., **कीट० सविषः कीटोऽयम् । गुणाः–प्राणनाशनः, येन दष्टस्य वेगज्ञानं सर्पदंशवद्भवति, तास्ताश्च तीव्रा वेदना भवन्ति, सन्निपातिकरोगकरः किंचायं दंशः वर्णेन रक्तपीतसितारुणः क्षाराग्निदग्धवच्च** ( सुक. ८.१५-१८; असंउ ४३ )
विषारी किडा; गुणदोष–प्राणनाशक, तो डसला म्हणजे सर्प दंशाप्रमाणेच वेग येतात व त्याप्रमाणेच तीव्र वेदना होतात. सान्निपातिक रोग होतात. हा दंश वर्णाने तांबडा, पिवळा, पांढरा, तांबूस. क्षार किंवा अग्नीने जळाल्या सारखा असतो.

**वाहन**–न., **उह्यते अनेन इति वाहनम् । यथाऽश्वादि** ( सुनि. ८.३ ) **यथा रथाश्वादि** ( सुसू. ४६.४९०; अहसू. ८.५५ )
वाहन. ज्याच्याने वाहून नेले जाते ते. जसे घोडा, बैल, रथ इत्यादी.
न., **कर्म० प्रवाहणम्** ( असंउ. ३८ )
कुंथणे, वाहाणे.

**–श्रम**–पु., **प्रवाहणजन्यः श्रमः** ( काखि. ११.४४ )
कुंथण्याचे श्रम. आवेच्या विकारात कुंथण्याने आलेला थकवा.

**वाहमाना**–वि., **प्रवाहनं कुर्बन्ती** ( चचि. ३०.२७ )
कुंथणारी.

**( वाहिका )**–स्त्री., रोग० प्रवाहिका ( काखि. १०.९५ ) आव, रक्ती आव.

**विंशतिगुण**–वि., गुरुलघ्वादिविंशतिगुणयुक्तः आहारः ( चसू. २५.३६ )
वीस गुणयुक्त. गुरु, मंद, हिम, स्निग्ध, श्लक्ष्ण, सांद्र, मृदु, स्थिर, इत्यादी गुणांचा आहार.

**विकक्षसृष्टसंसृष्ट**–वि., विगततृणस्थानसंपर्कम् (महानसम्) ( सुक. १.१२-१३ )
गवत वगैरेचा संपर्क नसलेले स्वयंपाकगृह.

**विकङ्कत**–पु., वनस्पति० फल० तद्गुणाः–तिक्ताम्लमधुरः शीतो लघुः पाके मधुरो दीपनः पाचनः कफपित्तघ्नः शोफकामलारक्तपित्तघ्नः (रा. ९.५४)
हिं.—कंटाई बिलांग्रा बिलांगुरा.
**म.—भेकळ, वेहकळ, वेहळी.**
गु.—विकलो.
बं.—वैंइंच.
ता.—हुलुमाणिका मालेगु.
वेहकळ – वनस्पतीचे फळ, कडु, आंवट, मधुर, शीत, लघु, पचल्यावर मधुर, दीपन, पाचन, कफ, सूज, कावीळ, रक्तपित्तनाशक आहे.

**(विकङ्कता)**–स्त्री., वनस्पति० बलिका ( रा. ४.४३ )
चिकण्याचा प्रकार.

**विकच्छा**–स्त्री., वनस्पति० महाश्रावणिका ( रा. ५.२१९ ) मोठी मुंडी.

**विकट**–वि., विस्तीर्णः ( सुउ. ४७.४३ ) विस्तीर्ण.
पु., वनस्पति० साकुरुण्डः ( रा. ६.१६ )
गाठाळ फळाची वनस्पती.
पु., गौरीपाषाणभेदः ( र. ३.१३८ )
शंखवर्णी सोमलाचा एक प्रकार.
वि., विषमम्, ग्रन्थिलम् ( र. ४.१५ )
विषम, गाठाळ.

**विकटोरु**–वि., विस्तीर्णौ ऊरू यस्याः, सा ( सुउ. ४७.४३ ) लांबरुंद मांड्या असणारी.

**विकण्टक**–पु., वनस्पति० तद्गुणाः– कषायकटुको रूक्षो रुचिप्रदो दीपनो वस्त्ररङ्गविधायकः कफघ्नः ( रा. ११.१९ )
धमासा गुण– तुरट, तिखट, रूक्ष, रुचि देणारा, दीपक, कफ नाशक आहे. वस्त्राला रंग देणारा आहे.

**विकत्थन**–वि., आत्मश्लाघित्वात् निन्दितः ( चइ. ७.१९ )
आत्मश्लाघेमुळे निंदित झालेला.

**( विकत्थना )**–स्त्री., पीडा श्लाघा, स्वगुणप्रशंसा ( असंचि. ९ )
पीडा, स्वताच्या गुणांची प्रशंसा.

**विकर्ण**–पु., वनस्पति० स्थौणेयकम् ( ध. ३.६९ )
गाजर, गंठीवन, गठोना.

**विकर्तिका**–स्त्री., लक्षण० गुदे कर्तनवत्पीडा ( चचि. २६.७ )
गुदामध्ये कातरल्यासारखी पीडा.

**विकर्षण**–न., यन्त्रकर्म० निर्हरणम् ( सुसू. ७.१७)
बाहेर काढणे.

**विकलत्व**–न., वैगुण्यम् ( सुशा. ६.३४)
व्यंग उत्पन्न झालेले, वैगुण्य, विकलत्व.

**विकलस्वरता**–स्त्री., गद्गदादिस्वरत्वम् ( सुसू. ३२.४ )
गद्‌गदस्वरांचा उच्चार, बिघडलेला स्वर.

**विकल्प**–पु., प्रयोगः ( सुसू. ४३.१ ) प्रयोग.
**व्याधिगणनारूपः सम्प्राप्तिभेदः** ( चनि. १.१२ )
रोगाचा भेद–दाखविणारी संप्राप्ती.
**अंशांशकल्पना** ( चसू. २०.३ )
भागांचीव भागाच्या भागांची कल्पना. भाग. हिस्सा, वाटा.
**तन्त्रयुक्ति०** ( सुउ. ६५.३९ ) एक तन्त्रयुक्ति.
**प्रकारः, भेदः** ( सुसू. ४५.९५ ) प्रकार, भेद.
**न्यूनाधिकता** ( चवि. ७.५ ) कमीजास्तपणा.

**विकल्पन**–न., तन्त्रयुक्ति० विकल्पः पाक्षिकाभिधानम् यथा सारोदकं वाऽथ कुशोदकं वा इत्यादि ( चक्र ) ( चसि. १२.४४ )
सारख्या गुणांच्या दोन वस्तूंपैकी कोणती तरी एक घेणे. सारवान झाडाच्या सारांचे पाणी किंवा कुश दर्भाचे पाणी घ्यावे, असे म्हणणे.
( परिव० ) **अवधारणम्** ( सुउ. ३९.९९ )
योजणे, उपयोगात आणणे.

**(विकल्पना)**–स्त्री., विशेषकल्पना ( चसि. ११.२३ )
विशेषतऱ्हेची योजना.

**विकसा**–स्त्री., वनस्पति० मांसरोहिणी (ध. ४.९४)
एक सुगंधी द्रव्य.
**वनस्पति० मञ्जिष्ठा** ( ध. १.१७ ) मंजिष्ठ.

**विकस्वरा**–स्त्री., वनस्पति० पुनर्नवाभेदः रक्तपुनर्नवा ( रा. ५.४०७ ) लाल पुनर्नवा.

**विकाणा**–स्त्री., वनस्पति० क्षीरकाकोली (इन्दु.असंउ.८)
अष्टवर्गापैकी एक.

**विकाणिका**–स्त्री., **क्षीरकाकोली** ( ड. सुउ. ६०.४७ ) अष्टवर्गापैकी एक.

**विकार**–पु., **रोगः** (चसू. १२.६२) रोग.
**दुःखम्। धातुवैषम्यम्** (चसू. ९.४) दुःख. धातूंची विषमता.
**दोषवैषम्यम्** ( अहसू. १.२० ) दोषांचे वैषम्य. ( विषमता )
**दोषः** ( चवि. ६.४ ) दोष.
**ज्वरः** ( चचि. ३.११ ) ताप.
**अव्यक्तप्रकृतेः कार्यं तत् षोडशसंख्याकं पञ्च बुद्धीन्द्रियाणि पञ्च कर्मेन्द्रियाणि समनस्काश्च पंचार्थाः** ( चशा. १.६४ )
विकार सोळा. पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये पाच पंचमहाभूते ( पाच शब्दादि अर्थ ) आणि सोळावे मन. जगाच्या मूळप्रकृतीच्या २४ तत्वांपैकी कोणाचेही कारण ( प्रकृति ) न होणारे बिकार.
**परिणाम०** ( चसू. ८.१४ )
परिणाम, बनाव, उत्पन्न झालेले पदार्थ.
**–चिह्न**–न., **रोगलक्षणम्** ( असंसू. ८.१५४ ) रोगाचे लक्षण.
**–जात**–न., **विकारसमुदायः** ( अहसू. १२.३३ ) विकारांचा समुदाय.
**–नामाकुशल**–वि., **विकारनामानभिज्ञः ( वैद्यः )** (अहसू. १२.६४) रोगाला नाव देता न येणारा (वैद्य).
**–परिमाण**–न., **विकाराणां संख्या** ( सुसू. २४.१२ ) विकारांची संख्या.
**–प्रकृति**–स्त्री.,**रोगहेतुः**(अहसू.१२.६६) रोगाचे कारण.
**–प्रभाव**–पु., **विकारस्य कर्मविशेषकार्यत्वम्** (चवि.१.१२)विकाराचा विशेष कर्म करण्याचा स्वभाव.
**–विद्**–वि., **विकारं जानाति इति विकारविद् ( वैद्यः )** (सुचि. ३८.११२) रोग जाणणारा. ( वैद्य )
**–सामान्यगुण**–पु., **विकारस्य सदृशो गुणो यस्य सः ( देशकालादिः )** (चइ. १२.१५)
विकाराशी सारख्या गुणांचा. ( देश, काल इत्यादी )

**विकाशिन्**–वि., **गुण० शैथिल्यकारकम्** (सुचि. ३३.३३) **यो धातुभ्यः ओजश्च विशोष्य सन्धिबन्धान् शिथिलान् करोति । यथा क्रमुककोद्रवद्रव्याणि** ( चक. १.५ )
शिथिल करणारे धातूपासून ओजाचे शोषण करुन संधि बंधने ढिली करणारा पदार्थ. जसे सुपारी व कोद्रू धान्य.

**विकासिन्**–वि., **विकसनशीलम्** ( चसू. २६.७९ ) विकसित होण्याचा स्वभाव असणारे.
**क्लेदच्छेदनः** ( चसू. २६.४३ (३) ओलावा नष्ट करणारे.
**–त्व**–न.. **हिंसनशीलत्वम् यथा विषस्य प्राणघ्नत्वात्** ( चचि. २३.२६ )
हत्या करण्याची प्रवृत्ति किंवा स्वभाव.
**–भाव**–पु., **विकसनशीलत्वम्** ( चचि. २४.३३-३४ ) विकास अथवा वाढीची प्रवृत्ति असणे.

**विकिर**–न., **जलाशय० निर्झरः वालुकादि विकीर्य गृह्यमाणोदकस्थानम्** ( सुसू. ४५.४ )
वाळू वगैरे उकरून तयार केलेला झरा.

**विकिरण**–न., **इतस्ततः प्रसरणम्** ( सुनि. ३.७ ) इकडे तिकडे फेकणे, विखुरणे.

**विकीरण**–पु., **वनस्पति० अर्कः** ( ध. ४.१३ ) रुई.

**विकीर्णरोमन्**–न., **वनस्पति० सुगन्धि० स्थौणेयकम्** ( रा. १२.१२५ ) सुगंधी थुणेर. गाजर.

**विकुटा**–स्त्री., **रेवतीग्रह०** ( कारेतीक. ३४.३५ ) रेवतीग्रह.

**विकुर्वाण**–वि., **विकृतिं गच्छन्** ( अहसू. १२.६२ ) बिघडणारा.

**विकूजन**–न., **अन्त्रभागे जायमानो ' गुरगुर् ' इति शब्दः** ( र. १८.४४ )
आतड्यात होणारा गुरगुरशब्द.
**अव्यक्तशब्दकरणम्** ( सुउ. ५६.७ )
अस्पष्ट शब्द उच्चारण.

**विकूणन**–न., **लक्षण० संकोचनम्** ( असंउ. १८ ) संकुचित होणे.

**विकृत**–वि., **विकृतिमापन्नम्** ( अहसू. १.७ ) बिघडलेले, खराब झालेले.
**–व्याधि**–पु., **गलत्कुष्टादिरोग०** ( सुसू. २९.९.१५ ) द्र० **' कुष्ठ '** गलत् कुष्ठादिरोग, महारोग.
**–स्वरता**–स्त्री., **स्वाभाविकस्य स्वरस्य वैपरीत्यम्** ( सुसू. ३२.४ )
आवाज बदसूर होणे. अस्वाभाविक स्वर असणे, आवाज बिघडणे.

**विकृतक**–पु., **मणि० वैक्रान्तः** ( र. २.७४ ) तोरमल्ली.

**विकृताकृति**–वि., **अमानुषाकृतिगर्भः** ( सुशा. २.५० ) मानवेतर आकृतीचा गर्भ.

**विकृति**–स्त्री., **व्याधिः** ( चचि. १५.३७ ) रोग.

विकृतस्थितिः ( चशा. ४.१४ ) रोगी स्थिती.

**-बल**-न., **रोगस्य बलम्** ( चवि. ८.१२३ ) रोगाचे बल.

**-विषमसमवेत**-वि., **विकृत्या हेतुभूतया विषमः प्रकृत्यननुगुणः समवायः यस्य, सः ( रसः दोषो वा** ( चवि. १.१० ) कारणाच्या गुणकर्मांच्या विपरीत असलेला. कारणाच्याही प्रतिकूल गुणांचे एकत्र येणे.

**विकृतेक्षण**-वि., **पुष्पितनेत्रादिः** ( सुसू. २९.९-१५ ) दृष्टि बिघडलेला.

**विकृन्तन**-वि., **विशेषेण कृन्तनम् । सर्वधातूनां स्वगुणप्रकर्षेणाधःपातनम्** ( र. २.६१ ) स्वतःच्या अतितीक्ष्ण गुणांनी धातूंना कापणे.

**विकृष्टकाल**-पु., **चिरकालः विप्रकृष्टकालः** ( सुउ.५०.११-१२) फार वेळ, चिरकाल.

**विकेशिका**-स्त्री., **तिलकल्कमधुघृताक्तवस्त्रस्य सूत्रस्य वा वर्तिः** ( सुसू. १८.२१ ) तिळाची चटणी मध व तूप यांनी भिजवलेली कापसाची सुताची किंवा वस्त्राची वात.

**विकेशिकौषध**-न., **विकेशिकायां उपलिप्तं औषधम् यत् व्रणेषु उपयुज्यमानम्** ( सुसू. १८.२१ ) वातीला लावलेले औषध, जे व्रणात घालण्यास योजितात ते.

**विकोथ**-पु., **पूतिभवनम्, दुर्गन्धीभवनम्** ( सुउ. २०.१५ ) दुर्गंधी होणे, कुजणे.

**विक्रान्त**-न., **खनिजद्रव्य० वैक्रान्तम्** ( रा. १३.५० ) तोरमल्ली.

वि., **विक्रमी** ( सुचि. ३०.६ ) विक्रम करणारा, पराक्रमी.

( **विक्रान्ता** )-स्त्री., **वनस्पति० द्रवन्ती** ( रा. ५.३४७ ) उंदीरकानी.

**वनस्पति० हंसपादी** ( रा. ५.१६६ ) राजहंस.

**वनस्पति० विष्णुक्रान्ता** ( रा. ५.१७३ ) विष्णुक्रान्ता.

**वनस्पति० सुवर्चला** ( रा. ४.१४५ ) सूर्यवेल, आळशी, ब्राह्मी.

**वनस्पति० वत्सादनी** ( रा. ३.३२ ) वासनवेल.

**वनस्पति० अपराजिता** ( रा. ४.१ ) एक वनस्पती.

**विक्रियमाणा**-वि., **रूपान्तरमापद्यमाना** ( चवि. ८.७१ ) रूपांतर होण्याच्या स्थितीत असलेली.

**विक्रोशन**-(परिव०) न., **रोदनम्** ( सुउ. ६२.८ ) रडणे.

**विक्लव**-वि., **भीतः, कातरः, स्तोकक्लेशाभिभवनीयम् ( मनः )** ( चचि. ८.९४; सुचि. ७.३० ) भ्यालेला, भित्रा, भयभीत झालेला. थोड्याही क्लेशाने गलितधैर्य होणारे मन ज्याचे आहे असा.

**विक्लित्ति**-स्त्री., **विक्लेदनम्, शुष्कत्वनिवृत्तिः** ( अहसू. ८.५२ ) ओलावा, शुष्कत्व नष्ट होणे.

**विक्लिति**-स्त्री., **द्रव्यान्तरसंयोगः** ( चवि. ८.१३६ ) दुसऱ्या द्रव्यांचा संयोग.

**विक्लेद**-पु., **क्लेदः** ( सुसू. १५.५(२) ओलावा.

**विक्षय**-पु., **रोग० मद्यजव्याधि० त्यक्तमद्यस्य पुनः सहसा अनुचितमद्यसेवनेन वातात् कष्टतमोऽसौ व्याधिर्भवति, विशेषतः दुर्बलस्य । तल्लक्षणानि-हृत्कण्ठरोगः, संमोहः, छर्दिः, अंगरुजा, ज्वरः तृष्णा कासः शिरःशूलश्चेति** ( चचि. २४.२०२ ) **हृत्कण्ठरोधः** ( असंनि. ६.२३ ) विक्षय - मद्यामुळे होणारीव्याधि.

मद्य सोडलेल्या दुर्बल माणसाने एकाएकी अयोग्य प्रकारचे व अयोग्य तऱ्हेने मद्य प्राशन केले तर त्यामुळे कष्टतम वातविकार होतो. ह्या विकारात हृदय-कंठ यांना फार पीडा होते. मोह, मूर्च्छा, अंग फार दुखते, ज्वर, तृष्णा, कास, शिरःशूल व हृदयकंठावरोध ही लक्षणे होतात.

**विक्षिप्यमाण**-वि., **प्रसार्यमाणः प्रेर्यमाणः** ( ड. सुउ. ३९.२३ ) प्रसरणशील, विकसनशील, प्रेरणा केलेला, ढकललेला.

**विक्षीर**-पु., **वनस्पति० अर्कः** ( ध. ४.१३ ) रुई.

**विक्षेप**-पु., **प्रेरणम्** ( सुसू. २१.८ ) प्रेरणा.

**व्यानस्य कर्म, रसधातोः शरीरे वहनं प्रक्षेपणं च** ( चचि. १५.३६ ) प्रेरणा व्यानवायूचे कार्य, रसधातूचे शरीरात वहन व प्रसरण.

**अङ्गविक्षेपः । अवयवानाम् इतस्ततः क्षेपणम्** ( सुउ.३९.८५ ) अंगाची इतस्ततः हालचाल, अवयवांची विशिष्ट हालचाल.

**-संघातकर**-वि., **वियोगमेलककरः** ( चक्र. चसि. १.३९ ) विभक्तांस एकत्र आणणारा,

**विक्षेपण**–न., **प्रेरणवद् वेदनाविशेषः** ( सुसू. २२.११ ) पसरणाऱ्या वेदनांची स्थिती, झटके आल्यासारखी वेदना.

**विगत**–वि., **गतम्** ( चनि. १.४४ ) गेलेले.

**–ज्वर**–वि., **मुक्तज्वरः सन्तापरहितः** ( चनि. १.४४) ज्याचा ज्वर निघालेला आहे असा मनुष्य.

**–लक्ष्मी**–वि., **निःशोभः अश्रीकः** ( चचि. २३.१०७ ) तेजोहीन. कळाहीन. विशोभित.

**विगतोन्मादलक्षण**–न., **नष्टोन्मादस्यलक्षणम्** ( चचि. ९.९७ ) उन्माद नाहीसे झाल्याचे चिन्ह.

**विगन्ध**–वि., **विगतः पूतिगन्धः यस्य सः** ( चक्र. चसि. ३.११ ) **विशिष्टगन्धवत** ( **विस्रगन्धम्** ) **विकृतगन्धम्** ( सुशा. ३.१० ) कुजकी घाण गेली आहे असा; विशिष्ट वासाचा, वासात विकृति झालेला.

**विगन्धक**–पु., **वनस्पति० इङ्गुदी** (रा.८.१८) हिंगणबेट.

**( विगन्धिका )**–स्त्री., **वनस्पति० हपुषा** ( रा. ४.१२ ) खडशेरणी.

**वनस्पति० अजगन्धा** ( ध. २.१०० ) अजवला.

**विगीत**–वि., **विपरीतत्वेन ज्ञातम् निन्दितम्** ( चइ. ४.७ ) विपरीत अर्थाने समजलेले, निंदित, निंदिलेला.

**विगीति**–स्त्री., **विरुद्धकोटिकार्थसमावेशात्मक–विरुद्ध-कथनम्** ( चवि. ६.४ ) विरुद्ध सांगणे.

**विगुण**–वि., **संकुचितम्** ( सुनि. १२.६ ) संकुचित.

**कुपितम्** ( सुउ. १.२०-२१ ) प्रकुपित झालेले.

**दुष्टम्** ( सुउ. ७.६ ) बिघडलेले. प्रकुपित झालेले.

**विपरीत** ( सुचि. ३८.१८-१९ ) उलट गतीने असलेला प्रतिलोम झालेला ( वायु ).

**विगुणानिल**–पु., **उन्मार्गगामी वायुः** ( सुउ. ५६.२० ) स्वस्थान सोडून अन्यत्र गेलेला वायु.

**विगृह्यवक्तृ**–वि., **परवाक्यमुच्छिद्य वक्तुं शीलः** ( सुशा. ४.६८-७० ) दुसऱ्याचे बोलणे खोडण्याच्या उद्देशाने बोलण्याची सवय असणारा वक्ता.

**विगृह्यसंभाषा**–स्त्री., **जल्पवितण्डास्वरूपं संभाषणम्** ( चवि. ८.१६ ) अडवणूक करणारे भाषण, अधिक बोलून खोटा स्वपक्ष स्थापन करणारे भाषण,

**विग्रथित**–वि., **सम्यक् अनङ्कुरितः, ग्रन्थिभूतः** ( **व्रणः** ) ( सुसू. ५.३६ ) **विषमसंस्थानः** (अहृसू. २९.४४) चांगले अंकुर न आलेला, गाठाळलेला, गाठींनी युक्त असल्यामुळे उंचनीच दिसणारा, उंचनीचपातळीचा.

**विग्रह**–पु., **शरीरम्** ( चशा. ४.९ ) अंग-प्रत्यंगे स्पष्ट होणे, आकार, आकृति.

**वादः, वाग्युद्धम्** ( चवि. ८.२० ) **कलहः** ( अहृसू. २.४२ ) वाग्युद्ध, भांडण, शब्दाशब्दी.

**विघट्टन**–वि., **विविधप्रकारेण चालनम्** ( सुउ.४६.२३ ) नाना प्रकारांनी हालविणे.

**विघण्टिकाभिध**–पु., **वनस्पति० गुच्छाह्वकन्दः** ( रा. ७.६१ ) विघंटिका नावाची वनस्पती.

**विघात**–पु., **वर्जनम्** ( चशा. ४.४१ ) निषेध, वर्ज केलेला.

**विघुष्ट**–वि., **शब्दितम्** ( अहृसू. ३.२४ ) मधुर, ध्वनी ( आवाज ) असलेले.

**विघूर्णन**–वि., **भ्रमणम्** ( असंउ. ४५ ) गरगर फिरणे, झोकांडे खाणे, फिरलेले.

**विघृष्ट**–वि., **घर्षितम् व्रणप्रकारेष्वेकः** ( असंशा. ११.४७) घासलेले. व्रणाचा एक प्रकार. खरचटलेले.

**विघ्नेशानकान्ता**–स्त्री., **वनस्पति० श्वेतदूर्वा** ( रा. ८.२२९ ) पांढरी दूर्वा.

**विचक्षण**–वि., **चतुरः** ( सुचि. ८.३७ ) हुषार, चतुर.

**( विचक्षणा )**–स्त्री., **वनस्पति० नागदन्ती** ( रा. ५.२६) नागदन्ती.

**विचर्चिका**–स्त्री., **रोग० कुष्ठभेदः, अयं कफप्रायः, तल्लक्षणानि–गात्रेषु अतिकण्डूर्तिरुजः रूक्षा राजयश्च भवंति** ( सुनि. ५.१३; चचि. ७.३० ) ओली खरुज. कुष्ठाचा भेद. कफप्रधान, त्याची लक्षणे–अवयवांना अती खाज, पीडा व रूक्ष अशा मधूनच रेषा उमटतात.

**विचर्ची**–स्त्री., **क्षुद्ररोग० विचर्चिका** ( सुनि. १३.२८ ) ओली खरुज.

**विचार**–पु., **संकल्पनम्, तच्च मनसः एकं कर्म** ( चशा. १.२१ ) विचार. मनाचे एक कर्म.

**गतिः, विचरणम्** ( चक्र. चसू. २६.११ ) गति, हालचाल.

विविधाश्चेष्टाः ( अहृसू. ९.९ )
अनेक प्रकारच्या हालचाली.

**विचारण**–न., **गतिविशेषकरम्, विधारणम्, मनसोऽनेकविकल्पकारणम्** ( सुसू. ४१.४(४))
विशेष गति करणारे, धारण करणारे, मनात अनेक विचारतरंग उत्पन्न होण्याचे कारण.

**विचारणा**–स्त्री., **द्रव्यान्तरासंयुक्तस्नेहपानं वर्जयित्वा कृतः स्नेहोपयोगः** ( चसू. १३.४ )
स्नेहामध्ये अन्य द्रव्य संयुक्त न करता करावयाचे स्नेहपान वर्ज्य करून केलेला स्नेहाचा उपयोग. द्रव्याशी स्नेह संयुक्त करून केलेला स्नेहाचा उपयोग. पेज, खीर, शिरा इ० बरोबर केलेला स्नेहाचा उपयोग.
**प्रयोगकल्पना** ( अहृसू. १६.१५ )
रसांच्या निरनिराळ्या संयोगाचे ६४ प्रकारचे केलेले प्रयोग.
**ऊहापोहाभ्यां वस्तुविमर्शः** ( सुशा. १.१७ )
ऊहापोह करून निर्माण झालेले वस्तूचे ज्ञान.

**विचार्य**–वि., **विचारयितुं योग्यम्; मनोविषयाणां एकः। उपपत्त्यनुपपत्तिभ्यां यद्विमृश्यते तत्** (चशा.१.२०)
विचार करण्यास योग्य. मनाच्या अनेक विषयांपैकी एक. उपपति आणि अनुपपत्ति या दोहोंनी ज्याचा विचार होतो ते. साधक बाधक प्रमाणांनी विचार करण्यासारखे.

**विचिकित्सा**–स्त्री., **सन्देहः** ( चसू. ११.७ ) संशय.

**विचित्त**–वि., **नष्टमनस्कः** ( सुउ. ४८.१५ )
अस्वस्थ चित्ताचा. उदास मनाचा. काही सुचत नसलेला.

**विचित्र**–न., **वनस्पति० शीर्णवृन्तम्** ( ध. १.१७९ )
काकडीचा प्रकार, पिवळट काकडी.
पु., **वनस्पति० अशोकः** ( ध. ५.१५९ ) अशोक.

**( विचित्रा )**–स्त्री., **वनस्पति० मृगाक्षी** ( रा. ७.२५८ )
लहान चिभडे.

**–प्रत्ययारब्ध**–वि., **परस्परविलक्षणैः कारणैरारब्धम्** ( अहृसू. ९.२८ )
परस्पर विपरीत गुणांच्या महाभूतांनी उत्पन्न झालेले द्रव्य.

**–प्रत्ययारब्धद्रव्य**–वि., **परस्परविलक्षणमहाभूतसंघाताऽऽरब्धं द्रव्यम्, क्वचिद्द्रव्ये यादृगेव भूतसंघातो द्रव्यस्याऽऽरम्भकस्तादृगेव रसादीनाम् तत्समान-प्रत्ययाऽऽरब्धम्, तत्सामान्यगुणान्नाऽतिक्रामति । क्वचिदन्यादृग्भूतसंघातो द्रव्यस्याऽऽरम्भकोऽन्यादृग्रसस्याऽन्यादृग्गुणस्येत्यादि, तद्विचित्रप्रत्ययाऽऽरब्धम् तत्सामान्यगुणानतिक्रामति । यथा 'स्वादुर्गुरुश्च गोधूमो वातजिद्वातकृद्यवः । उष्णा मत्स्याः पयः शीतं कटुः सिंहो न शूकरः** ( अहृसू. ९.२८ )
परस्पर विसंगत गुणांच्या महाभूतांनी बनलेले द्रव्य, काही द्रव्यात जी त्या द्रव्याची आरंभक महाभूते असतात, तीच महाभूते रसादींचाही परिपोष करतात. ते द्रव्य समान प्रत्ययारब्ध होय. ते सामान्य गुण सोडीत नाही; पण जेव्हा द्रव्य घटक महाभूते व रसादिकांची महाभूते भिन्न असतात ते विचित्र प्रत्ययारब्ध द्रव्य होय. ते सामान्य गुण सोडते. जसे गहू आणि यव ही दोन्ही द्रव्ये मधुर व गुरु गुणांची असता गहू वातनाशक व यव वातकर आहे. तसेच दूध थंड पण मासे उष्ण किंवा सिंहाचे मांस तिखट असते तर डुकराचे मधुर असते. इ०.

**विचित्रक**–पु., **वनस्पति० भूर्जः** ( रापरि. ९.२२ )
भूर्जपत्र.

**विचिन्तित**–वि., **कल्पितम्** ( चइ. १२.५८ ) योजलेले.

**विचिलक**–पु.,**सविषकीट० तद्दंशपरिणामाः प्राणनाशनाः, वेगज्ञानं सर्पवद्भवति, तास्ताश्च तीव्राः वेदनाः भवन्ति, तथा सान्निपातिकाः रोगा भवन्ति, दंशस्तु वर्णेन रक्तपीतसितारुणः क्षाराऽग्निदग्धतुल्यः** ( सुक. ८.१५-१८ )
विषारी किडा; याच्या दंशाने प्राणनाश ओढवतो, सर्पासारखेच वेग जाणवतात, व त्या त्या प्रकारे वेदना होतात; सांनिपातिक स्वरूपाचे रोग होतात, दंशाचे स्थान तांबडे, पिवळे, पांढरे वा तांबूस असून ते क्षाराने किंवा अग्नीने जळाल्यासारखे होते.

**विचूर्णन**–( परिव० ) न., **चूर्णीकरणम्** ( र. २.३४ )
चूर्ण करणे.

**विचेय**–वि., **चयनार्हः, गवेषणीयः** ( सुचि. ३०.३७ )
संग्रहणीय. शोधण्याजोगे.

**विचेष्टन**–न., **विगतकायपरिस्पन्दनम् विरुद्धचेष्टनं करचरणादिक्षेपाऽऽदिकम्** ( सुसू. २५.३४-३५ )
हालचाल बंद पडणे, हातपाय आपटणे वगैरे वेडीवाकडी हालचाल.

**विच्छिन्न**–वि., **अन्तराऽन्तरा वेगितम्** ( चचि. २०.९ ) **सविरामम्** ( असंनि. ४ ) **अल्पाऽल्पप्रवर्तकम्** ( ड. सुउ. ४०.१७ )

थांबून थांबून वेग येत असलेले, थोडे थोडे प्रवृत्त करणारे.

**-मद्य**-वि., त्यक्तमद्यः ( पुरुषः ) ( ड. सुउ. ४७.४९ ) मद्यपान सोडलेला.

**विच्छेद**-पु., खण्डः ( असंसू. ६ ) खंड पडलेला.

**विजन**-पु., एकान्तः विविक्तदेशः जनरहितस्थानम् ( सुसू. ४६.४५८ )
एकांत, ओसाड, मानवरहित – प्रांत.

**विजयधूप**-पु., सिद्धौषधि० **शिलाजतुकणगुग्गुलुमहिषाक्षगुग्गुलु श्वेतकरवीरचोरकसरलकुन्दुरुकुष्ठरोहिषतृणरालाबोलानां धूपः, अयं सुभग त्वबुद्धिविजयप्रदः पिशाचादिग्रहनाशनो जीर्णज्वरे च विहितः** ( र. २२.१६७-६८ )
धूपाचे तयार औषध.
शिलाजीत, कणगुग्गुळ, म्हशागुग्गुळ, पांढरी कण्हेर, चारोळी, देवदार, बिरोजा, कोष्ट, रोहिष गवत, राळ आणि बोळ यांचा धूप. हा भाग्य, बुद्धि, विजय देणारा, पिशाचादिग्रह नाशक आणि जीर्णज्वरात उपयोगी म्हणून सांगितला आहे.

**विजयन्तिका**-स्त्री., वनस्पति० बिल्वः ( ध. १.११० ) बेल.

**विजयभैरवतैल**-न., सिद्धतैल० **हरितालमनःशिलागन्धकपारदान्समभागिकान् धान्याम्लेन पेषयित्वा वस्त्रे विलेप्य तद्वर्तिकामुद्दीपयेद्येन तैलं पतति। अस्य पानविलेपनाभ्यां कम्पवातप्रमुखानां वातरोगाणां विनाशो भवति** ( र. २१.१६१ ) **बाहुकम्पशिरःकम्पजानुकम्पैकांगवातादिवातविकाराणां विनाशनम्** ( र. २१.१६२-६३ )
सिद्ध तैलाचे नांव.
हरताळ, मनःशिला, गंधक, पारद, समभाग घेऊन धान्याम्लामध्ये वाटून एका वस्त्राला त्याचा लेप द्यावा. आणि त्याची वात पेटवून जाळावी. जळतांना त्यातून जे तेल पडेल ते तेल घ्यावे. त्याचे नाव **विजयभैरवतेल.** हे तेल पिण्यास व चोळण्यास वापरल्याने कंपवात, बाहुशिरःकंप, जानुकंप, एकांगवात इत्यादी विकारनाशक आहे.

**विजया**-स्त्री., वनस्पति० **हरीतकी** ( ध. १.२०५ )
हिरडा.
**वनस्पति० नीलिनी** ( ध. १.२३३ ) काळादाणा. नीलीचे बी.
**वनस्पति० वचा** ( रा. ६.८ ) वेखंड.
**वनस्पति० श्वेतवचा** ( रा. ६.१० ) पांढरा वेखंड.
**वनस्पति० मञ्जिष्ठा** ( ध. १.१८ ) मंजिष्ठ.
**वनस्पति० अग्निमन्थः** ( रा. ९.१३६ ) अरणी.
**वनस्पति० क्षुद्राग्निमन्थः** ( रा. ९१.३८ )
लहान अरणी.
**वनस्पति० मेदा** ( ध. १.१३० )
मेदा, अष्टवर्गापैकी एक.
**वनस्पति० भङ्गा** ( र. १२.१२१-२२ ) भांग.
**वनस्पति० शुक्लाङ्गी** ( रा. ४.१२१ ) पांढरी निर्गुंडी.
**वनस्पति० शान्ता** ( रा. ८.१५५ ) आवळी.
**वनस्पति० अपराजिता** ( ध. ४. परि. १ )
गोकर्णी, विष्णुक्रांता.
**वनस्पति० नीलदूर्वा** ( रा. ८.२२७ ) हिरवी दूर्वा.
**वनस्पति० बला** ( चचि. २५.४७ ) चिकणा.

**-गुटिका**-स्त्री., सिद्धौषधि० **हरीतकीचित्रकौ प्रत्येकं पलत्रयं एलात्वक्पत्रमुस्तानामर्धपलं रेणुकाऽर्धपलं नागकेसरमर्धपलं, त्रिकटुपिप्पलीमूलवत्सनाभाः प्रत्येकं पलं, पारदः पलमात्रकः तत्समश्च गन्धकः इत्येतानि सूक्ष्माणि चूर्णयित्वा तुलार्धे पुराणे गुडे विनिक्षिपेद्घृतहस्तश्च बदरास्थिप्रमाणेन गुटिकाश्चरेत् मात्रा-एका गुटिका । समयः रात्रौ । फलं शोथपाण्डुनाशनम्** ( र. १९.९४-९८ )
सिद्धौषधाचे नाव. विजयागुटिकेमध्ये हिरडा व चित्रक १२।१२ तोळे एला, दालचिनी, तमालपत्र, नागरमोथा, रेणुकबीज, नागकेशर ही प्रत्येकी २।२ तोळे, त्रिकटु, पिंपळमूळ, वत्सनाभ प्रत्येकी ४ तोळे, पारा, गंधक प्रत्येकी ४।४ तोळे ही सर्व सूक्ष्मचूर्णे एकत्र करून दोनशें तोळे जुन्या गुळात एकत्र करावी. नतर त्याच्या बोराच्या बी एवढ्या गोळ्या करून ठेवाव्या. प्रमाण १ गोळी; घेण्याची वेळ रात्र; परिणाम—सूज व पांडुरोग नाशक.

**-वटिका**-स्त्री., पारदादियोग० **पारदभस्म गन्धकं विशाला कुष्ठं वत्सनाभो रेणुका पिप्पलीमूलं बाकुची विषमुष्टिरश्वगन्धा पलाशबीजं त्रिकटु त्रिफला त्रिजातकं वचा इत्येषां गृहीत्वा चूर्णं समभागिकेन गुडेन गुटिकाः कुर्यात् । अनुपानं मधु । पथ्यं सिताघृतक्षीरशाल्यन्नं यवौदनो वा । विहारः ब्रह्मचर्यम् । फलम्-सप्तकुष्ठानां विनाशः** ( र. २०.१९-२० )
सिद्धौषधाचे नाव. ही विजयवटिका आहे यामध्ये पारदभस्म, गंधक, इंद्रायणमूळ, कोष्ट, बचनाग,

रेणुकबीज, पिंपळीमूळ, बाकुची, कुचला, अश्वगंध पलाशबीज, त्रिकटु, त्रिफळा, त्रिजातक, वेखंड या सर्वांचे चूर्ण तितक्याच गुळाबरोबर एकत्र करून त्याच्या गुटिका कराव्या. मधाबरोबर त्या घ्याव्या. दूध, तूप, खडीसाखर, भात, यव यांचा आहार घ्यावा. ब्रह्मचर्य पाळावे. याच्या सेवनाने सातही प्रकारची कुष्ठे बरी होतात.

**विजला**–स्त्री., **वनस्पति० चञ्चुः** ( रापरि. ४.१८ ) पक्ष्याच्या चोचीच्या आकाराचे एक क्षुप.

**विजुल**–पु., **वनस्पति० शाल्मलीकन्दः** (रापरि. ७.४६) सावरीचा कंद.

**विजृम्भक**–पु., **व्याधिलक्षण० बहिरायामः** ( चसू. १४.२१ ) अंग ताठ होणे. अंग बाहेरच्या बाजूकडे ताठ होणे.

**(विजृम्भिका)**–स्त्री., **रोग० अशीतिवातरोगेष्वेकः, जृम्भा** ( कासू. २७.१९-२८ ) **नाड्या असम्यक्कल्पनजेयमस्ति मुहुर्मुहुर्वृद्धिमती** ( चशा. ८.४५ ) ऐशी वातरोगांतील एक रोग; जांभई; गर्भनाळ नाडी अव्यवस्थित कापल्यामुळे उत्पन्न होऊन वरचेवर वाढत जाणारी जांभई.

**विजृम्भण**–न., **जृम्भणम्** ( अहृसू. २.३५ ) जांभई.

**विज्जल**–वि., **पिच्छिलम्** ( चचि. १९.५ ) बुळबुळीत.

**विज्जुलिका**–स्त्री., **वनस्पति० जन्तुकारी** (रा. ३.१२९) पापडी, लाख.

**विज्ञान**–न., **शास्त्रस्य विस्तृतं सविशेषं वा ज्ञानम्** ( चवि. ८.१८ ) शास्त्राचे विस्तृत किंवा वैशिष्टय पूर्ण ज्ञान.

**प्रवृत्तिविशेषानुमेयं ज्ञानम्** ( चक. चवि. ४.८ ) व्यवसायाचे ज्ञान.

**शिल्पशास्त्रादिबोधः** ( सुशा. १.१७ ) शिल्पशास्त्राचे ज्ञान.

**लक्षणम् विज्ञायते सम्यक्परिचीयते अनेनेति विज्ञानं लक्षणम्** ( ड.सुचि.३५.३३; चइ. ९.२३ ) ज्याने चांगले समजते ते.

**–तैलगर्भ**–पु., **वनस्पति० अङ्कोटः** ( रा. ९.३८५ ) अंकोट.

**विज्ञानोपाय**–पु., **ज्ञापकसाधनम्** ( सुसू. १०.४ ) नीट कल्पना आणून देणारे साधन.

**विज्वर**–वि., **सन्तापरहितः नीरोगः** ( चचि. ३.३ ) ज्वररहित, तापरहित, निरोगी.



**विज्वरत्व**–न., **लक्षण० ज्वरशान्तिः** ( चचि. ३.१७० ) ज्वर नष्ट होणे, ज्वरशमन.

**विटक**–पु., **खनिजद्रव्य० गौरीपाषाणः** (ध. ६ परि. १४) सोमल.

**विटप**–न., **मर्म०** ( असंशा.७.४ ) **वंक्षणवृषणयोर्मध्यस्थं** जांघाडे व वृषण यांचेमधील मर्मस्थान.

**–मर्मन्**–न., **वंक्षणवृषणयोरन्तरे विटपं नाम मर्म, तत्र विद्धस्य षाण्ढ्यमल्पशुक्रता वा भवति** (सुशा. ६.२४) **सक्थिमर्म** ( सुशा. ६.६ ) **स्नायुमर्म** ( सुशा. ६.७ ) **वैकल्यकरं मर्म** ( सुशा. ६.१२-१३ ) **विटपमर्मणी द्वे वामदक्षिणभेदेन** ( सुशा. ६.१२ ) **मानम्–एकाङ्गुलम्** ( सुशा. ६.२८ ) जांघाडे व वृषण यांचे मधील मर्मस्थान, येथे आघात वा वेध झाल्यास नपुंसकत्व किंवा अल्प शुक्रत्व निर्माण होते; मांडीतील मर्म, स्नायुमर्म, अवयवाची विकलता करणारे मर्म, उजव्या व डाव्या बाजूस अशी हीं दोन मर्मे आहेत, याचे प्रमाण १ अंगुल.

**( विटपिन् )**–पु., **वनस्पति० वटः** (रा. ११.११३) वड.

**विटप्रिय**–पु., **वनस्पति० मुद्गरः** ( रा. १०.५१ ) सातवीण.

**विटवल्लभा**–स्त्री., **वनस्पति० पाटला** ( रा. ९.१५० ) पाडळ.

**विड**–न., **लवणम्** ( ध. २.२८ ) **पञ्चलवणेष्वेकम्** ( चसू. १.८८ ) बिडलवण.

**विडङ्ग**–न., **वनस्पति० तद्गुणाः–कटु–ईषत्–तिक्तम्–उष्णं–रूक्षं–लघु–( शिरोविरेचनम्** ( चसू. ४.११ ) **वमनम्** ( सुसू. ३९.३ ) **विरेचनम्** (चसू. १.८१ ) **वातकफघ्नम्; विषकृम्यग्निमान्द्यारुचिभ्रान्तिहरम्** ( **कुष्ठघ्न** ) ( चसू. ४.११ )

हिं.—वायविडङ्ग.

**म.—वावडिंग.**

गु.—वावडिंग, करकनाओ.

बं.—विडङ्ग.

ता.—वायुविलङ्गम्.

फा.—वारंगफावली.

वावडिंग. **गुण**—तिखट, थोडे कडू, उष्ण, रुक्ष, हलके, डोक्याचे रेचक, वामक रेचक, वातकफनाशक. विष, कृमि, अग्निमांद्य; भ्रांति, रुचिनाशक,

**-तण्डुलरसायन**-न., रसायनकल्प० तस्य विधिः- **द्रोणमात्रान् विडङ्गतण्डुलान् पात्रे पिष्टवत् उपस्वेद्य, विगतकषायं स्विन्नम् अवतार्य शिलायां पिष्ट्वा अनंतरं लोहकुम्भे मधूदकोत्तरं प्रावृषि अन्तर्गृहे भस्मराशौ चतुर्मासपर्यन्तं स्थापयेत्। अनंतरं तम् उद्धृत्य विशुद्धशरीरः सहस्रसंपाताभिहुतं कृत्वा प्रातः प्रातः बलानुसारेण उपयुंजीत। जीर्णे सति घृतवन्तम् ओदनं मुद्गामलकयूषेणालवणेन सह अश्नीयात्। शयनार्थं पांशुशय्या एव उपयोक्तव्या। एवं कृते सति मासादूर्ध्वं सर्वांगेभ्यः कृमयः निष्क्रामन्ति, तानणुतैलेनाभ्यक्तस्य वंशकंबिकया अपहरेत्। द्वितीये मासि पिपीलिकाः, तृतीये यूकाः ता अपि तथैवापहरेत्। चतुर्थे दन्तनखरोमाणि अवशीर्यन्ते। पञ्चमे प्रशस्तगुणलक्षणानि जायन्ते, अमानुषम् आदित्यप्रकाशं वपुः प्राप्नोति, दूराच्छ्रवणानि दर्शनानि च तमुपनमन्ति,। स च रसायनोपयोक्ता रजस्तमसी चापोह्य सत्वमधितिष्ठति, श्रुतनिगाद्यपूर्वोत्पादी गजबलाऽश्वजवः पुनर्युवाऽष्टौ वर्षशतानि आयुः अवाप्नोति । तस्य पुरुषस्य अभ्यङ्गार्थम् अणुतैलम् उत्सादनार्थं अजकर्णकषायः स्नानार्थं सोशीरं कूपोदकं चंदनम् उपलेपनार्थं च उपयोक्तव्यम्। आहारपरिहारौ भल्लातकविधानवत् ज्ञेयौ** (सुचि. २७.८)

वावडिंगाच्या तांदुळाचे रसायन, त्याचा विधि. साधारणपणे एक द्रोण ( १०२४ तोळे ) वावडिंगाचे तांदूळ कांडून पीठ भांड्यात वाफवावे. नंतर बाफवून तुरटपणा गेलेले ते पीठ घेऊन पाट्यावर वाटून लोखंडाचे घड्यात मध+पाणी भरून वर्षा ऋतूमध्ये ( निर्वातस्थळी ) अंतर्घरात राखेमध्ये चार महिने पर्यंत ठेवावे. नंतर ते काढून शरीर शुद्ध करून ऋग्वेदामध्ये सांगितलेल्या सहस्र संपाताध्यायातील मंत्रांनी सहस्र वेळा आहुती देऊन सकाळी दररोज पचनशक्ती पाहून रसायनसेवन करावे. ते पचल्यावर तूप घालून भात-मूग-आवळे यांच्या कढणाबरोबर मीठ न लावतां खावे. धुळी मध्ये झोपावे. असे केले की एक महिन्यानंतर सर्व शरिरातून कृमी बाहेर पडू लागतात. अणुतेलाने अभ्यंग करून वेळूच्या कामटीने ते काढावे. दुसऱ्या महिन्यात मुंग्या आणि तिसऱ्या महिन्यात उवा निघतात. त्याही तशाच काढाव्या. चवथ्या महिन्यात दात, नखे, अंगावरील केस गळतात. पाचव्या महिन्यात चांगली लक्षणे उत्पन्न होतात. सूर्यप्रकाशासारखे दैवी तेजयुक्त शरीर प्राप्त होते. दूर अंतरावरील ध्वनि व दृश्ये त्याला आकलन होतात आणि तो रसायन सेवन करणारा रज आणि तमोगुणापासून मुक्त होऊन सत्वगुणी बनतो. ऐकलेले पाठ होते, नवे श्लोक रचण्याचे सामर्थ्य येते. हत्तीप्रमाणे बलवान घोड्या प्रमाणे वेगवान पुनश्च तरुण होऊन आठशे वर्षे सुखाने जगतो. त्याला अभ्यंगासाठी अणुतैल, उटणे म्हणून अजकर्णाचा काढा वापरावा. आंघोळीला विहीरीचे पाणी वाळा घालून. लेपासाठी चंदन वापरावे. बाकी आहार विहार बिब्बा रसायनविधी प्रमाणे जाणावा.

**-तैल**-न., कृमिहरसिद्धतैल० अन्यगुणाः-**अनिलकफकृमिकुष्ठप्रमेहशिरोरोगापहरम्** ( सुसू.४५.११५ ) सिद्धतैलाचे नाव. या तेलाने कृमि नाहीसे होतात. वात, कफ, कुष्ठ, प्रमेह, शिरोरोग नाशक.

**-सार**-पु., **विडङ्गबीजम्** ( सुसू. ४४.९ ) वावडिंगाचे तांदूळ.

**विडङ्गतण्डुलः** ( र. २६.१६ ) वावडिंगाचे तांदूळ.

**-सिद्धतैल**-न., **विडङ्गैरण्डादिद्रव्यसिद्धं तैलम् तत् कुष्ठकृमिमेहार्शोग्रहणीक्लैब्यविषमाग्निनाशनम् इदं पानाभ्यङ्गानुवासनैः उपयुज्यते** (चसि ४.१८-२४) सिद्धतेलाचे नाव. वावडिंग एरंडादि द्रव्याने सिद्ध केलेले तेल. याने कुष्ठ, कृमि, मेह, मूळव्याध, ग्रहणी, नपुंसकत्व. विषमाग्नि यांचा नाश होतो. हे तेल पिणे, अभ्यंग करणे आणि बस्ती देणे अशा प्रकारे वापरले जाते.

**विडाल**-पु., प्रमाण० **कर्षः** ( कानि. ) ( उदावर्तचि. ) एक तोळा हे प्रमाण.

**( विडाली )**-स्त्री., वनस्पति० **विदारिका** ( ध. १.१४७ ) भुईकोहळा.

**विडालिका**-वनस्पति० **विदारिका** ( ध. १.१४७ ) भुईकोहळा.

**वितण्डा**-स्त्री., वादप्रकारः **वितण्डा नाम परपक्षे दोषवचनमात्रमेव स्वपक्षस्थापनाशून्यः परपक्षदोषवचनपरो वादो वितण्डा** ( चवि. ८.२८ ) वितंडवाद, दुसऱ्या पक्षाचे दोषच दाखविणे.

**वितत**-वि., **विस्तृतम्** ( सुचि. २९.१३ ) विस्तृत,

**वितथ**–न., अयथार्थम्, असत्यम् ( सुउ. ६०.८)
असत्य, व्यर्थ.
**निष्फलम् व्यर्थम्** ( सुसू. २०.२२ )
खोटे, निष्फल, व्यर्थ.

**वितर्क**–पु., सम्भावनात्मकं ज्ञानम् ( चवि. ४.४ )
वितर्क, अनुमान, अंदाज. संभवात्मक ज्ञान.
**विशिष्टस्तर्को वितर्को नाम अव्याप्त्यतिव्याप्त्यादिदोषरहितम् अनुमानम्** ( चवि. ८.८ )
विशिष्ट तर्क, अव्याप्ति, अतिव्याप्ति इत्यादी दोष रहित अनुमान.

**वितस्ता**–स्त्री., नदी०, सिन्धुदेशे विद्यमानायाः कस्याश्चित् नद्याः नाम । अधुना झेलम बितस्ता बिहट-इत्यादिभिर्नामभिः प्रसिद्धेयं नदी । यवनैस्तु अस्या एव हैडास्पेस बिडास्पेस ( टोमेनी ) इति नाम कृतम् । अस्याः नद्याः काश्मीरदेशे उत्पत्तिरस्ति ( सुचि. २९.२८ )
झेलम, वितस्ता नदी. बिहट इ० नावाने प्रसिद्ध. सिंध मधील एक नदी. हिचा उगम काश्मीर मध्ये आहे. यवनांनी हैडास्पेस, बिडास्पेस ( टोमेनी ) अशी नावे ह्या नदीला दिली आहेत.

**वितस्ति**–स्त्री., मान० विस्फारितकरस्याङ्गुष्ठाग्रात्कनिष्ठिकाग्रं यावन्मानम् ( र. १०.३४-३९ )
वीत. पसरलेल्या पंजाच्या आंगठ्याच्या टोकापासून करंगळीच्या टोकापर्यंतची लांबी. एक लांबी रुंदी मोजण्याचे साधन.

**वितान**–पु., बन्ध० शिरस्त्राणाकारेण विस्तारो व्रणबन्धविशेषः, स च मूर्धनि विधेयः ( सुसू. १८.१७ )
व्रण बांधण्याचा पट्टा. पालखीच्या आकाराचा. डोक्याला व पसरट भागावर बांधण्यास उपयुक्त. (पट्टा).

**वितानक**–पु., वनस्पति० माडः ( ध. ५.७० )
सिंधी, नारळ.
**दण्डधृतविस्तीर्णं परिपट्टम्, उल्लोचः**(असंसू.६.६१)
दांड्याला बांधलेला विस्तीर्ण पट्टा.

**वितुन्नक**–पु., वनस्पति० धान्यकम् ( ध. २.६३ )
धणे.

**(वितुन्निका)**–स्त्री., वनस्पति० तामलकी (रा. ५.१४४)
भुईआवळी.

**वितुन्नभूता**–स्त्री., वनस्पति० तामलकी ( ध. ३.८४ )
भुईआवळी,

**वितुन्ना**–स्त्री., वनस्पति० तामलकी ( रा. ५.१४४ )
भुई आवळी.

**वितुष**–वि., विगतः तुषः यस्य, निस्तुषम् ( असंसू. ६.१४० )
ज्याचे टरफल काढले आहे असा.

**वितूर्णक**–न., मुस्ता०कैवर्तमुस्तकम् (काखिल. १५)
नागरमोथा.

**वितोद**–पु., लक्षण० सूच्यादिभिरिव विविध-वेदना ( सुउ. ४८.७ )
सुई टोचल्याप्रमाणे होणाऱ्या वेदना.

**वित्रासन**–न., उपक्रम० विशेषेण त्रासो भीतिजननम् ( चनि. ७.८ ) भयोत्पादनम् ( चवि. ६१८ )
त्रास, भीती, भीती उत्पन्न करणे.

**विदग्ध**–वि., पक्वापक्वम् ( चचि. १५.१० ) अपक्वम् ( चचि. १९.१४ )
अर्धवट पक्के कच्चे.
**अपक्वम्** ( चचि. १९.१४ ) कच्चे.
**विरुद्धपरिणतिं प्राप्तः** ( ड. ) सुउ. २२.१० )
विपरीत गुणामध्ये परिणति झालेला.
**–ब्रध्न**–वि., विदग्धगुदः ( चसू. १४.१७ )
गुदपाक झालेला.

**विदग्धाजीर्ण**–न., रोग० विदग्धेऽजीर्णे भ्रमतृण्मूर्च्छाः, पित्ताच्च विविधा रुजः, धूमाम्लः उद्गारः, दाहः स्वेदश्च जायते ( असंसू. ११.५७ )
पित्तामुळे होणारे अजीर्ण. यात भ्रम, तहान,मूर्च्छा, पित्तजन्य नाना प्रकारच्या वेदना, गरम धुरकट आंबट ढेकर, आग आणि घाम ही चिन्हे होतात.

**विदग्धाहार**–पु., अम्लीभूताहारः ( सुसू. ४६.५२७ )
आंबट झालेला आहार.

**विदर्भ**–पु., दन्तरोग० अभिघातजोऽयं रोगः । दन्तमांसेषु दन्तकाष्ठादिना घृष्टेषु महान् संरंभो जायते । यस्मिन् सति दन्ताश्च चलन्ति; अयं विदर्भसंज्ञः रोगः ( असंउ. २५ )
विदर्भ नावाचा दन्तरोग. अभिघाताने होणारा हा विकार आहे. दातवणाच्या काडी इत्यादींनी जोराने दात घासण्यानंतर हिरड्यांचा फार क्षोभ होतो व दात हालतात.

**विदल**–न., धान्यप्रकार० शमीधान्यावयवः ( सुसू. ४६.३४८ )
द्विदल धान्य. शेंगाचे धान्य,

**काष्ठचूर्णम्** ( चचि. १(३).३ )
लाकडाचा भुसा.

**( विदला )**–स्त्री., वनस्पति० **श्यामा** ( रा. ६.३६५ )
काळे त्रिवृत–तेड, निशोत्तर.

**विदग्ध**–वि., **अत्यासक्तम्** ( सुसू. २७.१४ )
अतिशय खिळलेले, अतीशय चिकटून बसलेले शल्य.

**–जिह्वाग्र**–पु., **संलग्नजिह्वाग्रः** ( सुशा. ८.८ )
जिभेच्या टोकाला चिकटलेले.

**विदारक**–न., औषधिद्रव्य० लवणभेदः **वज्रकम्** ( रा. ६.५५ )
लवणाचा प्रकार, वज्रमीठ.

**( विदारिका )**–स्त्री., रोग० **कफमारुतेभ्यः कक्षावंक्षणेषु कठिनो मंदवेदनायुक्तो ज्वरान्वितो यो ग्रन्थिः उत्पद्यते, सा विदारिका** ( चचि. १२.८९ ) **सैव ' विदारी '** ( असंउ. ३६ )
रोगविशेष, कफवात काख व जांघ यात कठीण, मंद वेदना व ज्वर हे उपद्रव असलेली गाठ करतात तो.
**प्रमेहपिटका०** ( असंनि. १०.४१ )
मेहाची पुळी. विदारिका.
**कर्णरोग० संनिपातात् यः श्वयथुः सवर्णादिस्वरूप उपेक्षितश्च पक्कः सन् कटुतैलनिभं तत्सदृशं वा स्रावं स्रवेत् कृच्छ्रेण च रोहति; बहुकालप्रयुक्त-भैषज्यसंस्कारात् रूढो भवति, सः श्वयथुः विदा-रिकेति व्यपदिश्यते सा विदारिका रूढा लब्धास्पदा सती अवश्यं कर्णशष्कुलीं संकोचयेत्** (असंउ. २१;)
कानाचा रोग. त्रिदोषामुळे कातडीच्या रंगाची, ठणका असणारी नेहमी स्थिर असणारी सूज कानावर येते तिला विदारिका म्हणतात, तिची उपेक्षा केली पिकली म्हणजे त्यातून मोहरीचे तेलासारखा स्राव येतो· मोठ्या त्रासाने ती जखम भरून येते. ती सूज घट्ट होते; कानाची पाळीसुद्धां निश्चित स्वरूपात संकुचित होते.
**वनस्पति० विदारी** ( ध. १.१४७ ) भुईकोहोळा.

**विदारण**–न., **नखादिभिरवदारणवद् वेदनाविशेषः** ( सुसू. २२.११ )
नखादीनी चिरल्या किंवा फाडल्याप्रमाणे होणारी विशिष्ट वेदना.
वि., **शोफादिपाटनः ( क्षारः )** (हे.अहृसू.६.१५१)
सूज वगैरे फाडणारा ( क्षार ).

**विदारि**–स्त्री., वनस्पति० **विदारी** ( असंसू. १६.३ )
भुईकोहळा.

**–कन्द**–पु., शाक० **अयं जीवनः, बृंहणः, वृष्यः, कण्ठ्यः, रसायने शस्तः, बल्यः, मूत्रलः स्वादु-शीतलः च** ( चसू. २७.१२१ )
भुइकोहळा. जीवनशक्तिवर्धक, पुष्टिकर, शुक्रवर्धक, कंठाला हितकर. मधुर थंड.

**–गन्धा**–स्त्री., वनस्पति० **शालिपर्णी** ( ध. १.८८ )
सालवण.

**–गन्धादिगण**–पु., द्रव्यगण० **अयं व्याधिप्रत्यनीकः, तत्र द्रव्याणि विदारिगन्धा विदारी विश्वदेवा सहदेवा श्वदंष्ट्रा पृथक्पर्णी शतावरी सारिवा कृष्णसारिवा जीवकर्षभकौ महासहा क्षुद्रसहा बृहत्यौ पुनर्नवैरण्डो हंसपादी वृश्चिकाल्यृषभी चेति । विदारीगन्धादिरयंगणः पित्तानिलापहः शोषगुल्माङ्गमर्दोर्ध्वश्वासकासविनाशनः** ( सुसू. ३८.४-५ )
व्याधिशामक, द्रव्यगण या गणात सालवण, भुईकोहळा, चिकणा, मुद्रिका, गोखरू, पिठवण, शतावरी, पांढरी उपळसरी, काळी उपळसरी, जीवक ऋषभक, भाषपर्णी, मुद्गपर्णी, रिंगणी, डोरली, पुनर्नवा, एरंड, राजहंस, मेढशिंगी, व कुहिली ही औषधे येतात. हा विदारिगंधादिगण पित्तवात-नाशक, शोष, गुल्म, अंगमर्द, ऊर्ध्वश्वास व खोकला ह्या रोगांचा नाशक आहे.

**–गन्धादिघृत**–न., सिद्धघृत० **विदारिगन्धादिगण-सिद्धं काकोल्यादिगणकल्कप्रतिवापं पयोमधुसिता-युक्तं घृतं पैत्तिके अपस्मारे शमनार्थं पाययेत्** ( ड. सुउ. ६१.२९ )
सिद्धघृताचे नाव. यामध्ये काकोल्यादिगणाची चटणी घालून विदारिगंधादि गणाच्या काढ्याने सिद्ध करून दूध, मध, खडीसाखरयुक्त असे हे घृत पित्त अपस्मारात उपयोगी.

**–गन्धाद्यगण**–पु., **अस्मिन् गणे विदारिगन्धा बृहती पृश्निपर्णी निदिग्धिका श्वदंष्ट्रा चेत्येतानि द्रव्याणि भवन्ति** ( चचि. १.४२ )
विदारीगंधादीगण. यात सालवण, डोरली, पिठवण, रिंगणी, गोखरु ही द्रव्ये आहेत.

**विदारिणी**–स्त्री., वनस्पति० **काश्मर्यः** ( रा. ९.१४७ )
शिवण.

**विदारी**–स्त्री., वनस्पति० **सच गुणतः मधुरा शीता गुरुः**

**स्निग्धा बल्या वृष्या वातपित्तघ्नी रक्तपित्तघ्नी च** ( ध. १.४८; रा. ७.१९५ )

हिं.—बिल्लैयाकन्द, बिलाइकन्द, विदारीकन्द, बिलारी.

**म.—भुईकोहळा, बेन्द्रिचा वेल.**

गु.—फगबेलानो कन्द, भोकोळुं.

बं.—भुइकुमडा, श्वेतभूंइकुमड, कालभूइकुमड.

ता.—फाल्मोडिका.

भुईकोहाळा. भुईकोहळा. मधुर, शीत, गुरु, स्निग्ध, बलकर, वृष्य, वातपित्तनाशक व रक्तपित्तनाशक आहे.

**रोग० पित्तेन अन्तर्गले रागदाहतोदपूतिविशीर्णमांसयुतः यः श्वयथुः उत्पद्यते सः विदारीति नाम्ना प्रसिद्धः** ( सुनि. १६.६३ )

एक रोग— पित्तामुळे गळयात लाली, दाह, ठणका, दुर्गंधीयुक्त व मांस निघणारी अशी जी सूज उत्पन्न होते त्यास विदारी म्हणतात.

**क्षुद्ररोग० कक्षवङ्क्षणयोः विदारीकन्दवत् कठिना या पिटिका जायते सा** (असंउ. ३६) **द्र० 'विदारिका'**

क्षुद्ररोग— काख व जांघ यात भुईकोहळयाच्या कंदाप्रमाणे कठिण जी पुळी उत्पन्न होते ती.

**–कन्द**–पु., **कन्दशाक० शाकगुणाः–मधुरः बंहणः, वृष्यः, शीतः स्वर्यः अतिमूत्रलः, बल्यः पित्तवातहरश्च** ( सुसू. ४६.३०० )

भुईकोहळा. गुण– गोड, पौष्टिक, थंड, पित्त वात नाशक, अतिमूत्रल, स्वर, बल, शुक्र, यांना हितकर.

**–गणसिद्धतैल**–न., **विदारीगणेन सिद्धं तैलम्। इदं वृश्चिकदंशे सेचनोपयोगि** ( सुक. ८.७० )

बिदारीगणाने सिद्ध तेल. हे विंचवाच्या दंशावर शिंपडण्याकरिता उपयुक्त.

**–गन्धा**–स्त्री., **वनस्पति० शालिपर्णी अंगमर्दप्रशमनद्रव्यगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१७ )

सालवण, अंग दुखणे कमी करणाऱ्या गणातील द्रव्य.

**विदार्य**–पु., **वनस्पति० विदारी** ( असंसू. १५.१४ )

भुईकोहळा.

**विदार्यादिगण**–पु., **द्रव्यगण० अस्मिन् गणे विदारी एरण्डः मेषशृङ्गी क्षुद्रवर्षाभूः सुरदारु मुद्गपर्णी माषपर्णी कपिकच्छूः अभीरू वीरा जीवन्ती जीवक ऋषभकः सारिवा हंसपादी चेत्येतानि द्रव्याणि वर्तंते** ( अहसू. १५.९-१० )

विदारीगणाची औषधे. ह्या गणात भुईकोहळा, एरंड, मेढशिंगी, पुनर्नवा, देवदार, मुद्गपर्णी, माषपर्णी, कुहिली, शतावरी, पिठवण, हरणदोडी, जीवक, ऋषभक, उपळसरी, हंसराज ही द्रव्ये आहेत.

**विदाह**–पु., **लक्षण० विशेषेण सर्वाङ्गदहनमिव चत्वारिंशत्पित्तविकारेष्वेकः** ( चसू. २०.१४ )

विशेषतः संपूर्ण अंग जळते आहेसे वाटणे. चाळीस पित्तविकारापैकी एक विकार.

**रक्तादिविदाहः, उपनाहस्वेदजन्यः** ( चसू. १४.३८ )

रक्तादिकांचा अम्लपाक. पोटीसाचे तीव्रतेने होणारा दाह.

**अन्नस्य विदग्धत्वम्, उदरे, उरसि वा तस्य संज्ञा जायते** ( चचि. १५.५५ )

खाल्लेले अन्न नीट न पचता अति आंबट होऊन पोटात वा छातीत त्याची जळजळीच्या रूपाने जाणीव होणे.

**विद्रध्यादीनां पाकः** ( सुउ. ३९.८१ ) गळवे वगैरे पिकणे.

**अम्लपाकः** (ड.सुउ.६४.१०) पचल्यावर आंबट होणे.

**पाकावस्था** ( इन्दु. असंउ. २८ ) पचनावस्था.

**विदाहिन्**–पु., **गुण० यत् अम्लोद्गारदाहतृष्णाप्रभृतीनुदीर्य कृच्छ्रात् पाकमुपगच्छति, पित्तं च प्रकोपयति तद् ( द्रव्यम् )** ( सुसू. २१.२१ ) **'द्रव्यस्वभावादथ गौरवाद्वा चिरेण पाकं जठराग्नियोगात्। पित्तप्रकोपं विदहत् करोति तदन्नपानं कथितं विदाहि** ( डल्हण. सुसू. ४५.१५८ )

आंबट ढेकर, दाह, तहान इ० लक्षणे उत्पन्न करून जे द्रव्य कष्टाने पचते व पित्त वाढविते ते, केवळ द्रव्याचा स्वभाव अथवा गुरुगुणामुळे जठराग्नीशी संयोग होऊन पचन फार उशीरा होते. पित्तप्रकोप व जळजळ उत्पन्न करते असे अन्नपान विदाहि होय.

**विदाहकराणि द्रव्याणि यथा मरीच–सर्षपमद्यप्रभृतीनि** ( सुउ.५०.३ )

मिरी, मोहरी, मद्य यासारखी जळजळ उत्पन्न करणारी द्रव्ये होत.

**विदितवेदितव्य**–वि., **विदितानि वेदितव्यानि ज्ञेयतत्त्वानि यस्य येन वा सः** ( चवि. ७.४ )

माहित असलेले समजून घेणे, ज्याच्या विषयी किंवा ज्याच्या साह्याने जाणून घ्यावयाची तत्त्वे जाणून घेता येतात तो.

**विदितागम**–वि., **ज्ञातभोजनादिशास्त्रः हेयोपादेयार्थाव-**

धारणार्थं परिशीलितशास्त्रः ( सुसू. ४६.४६५; सुउ. ५६.५ )
भोजनादि शास्त्र माहीत असलेला प्रत्येक विषयातील ग्राह्याग्राह्यांश समजण्याच्या दृष्टीने शास्त्राभ्यास केलेला.

**विदुर**–वि., **स्थायी** ( चइ. २.१६ ) स्थायी.

**( विदुल )**–पु., **वनस्पति० वेतसः** (ध. ५.११७ )
जलवेतस.

**( विदुला )**–स्त्री., **वनस्पति० सातला** ( ध. १.२३८ )
शिकेकाई.

**विदूरक**–न., **मणि० वैडूर्यरत्नम्** ( र. ४.५ )
वैडूर्यमणी.

**विदेहाधिप**–पु., **निमिः इति नाम्ना प्रसिद्धः विदेहदेशस्थ राजा यः शालाक्यतन्त्रं चकार** ( सुउ. १.५ )
निमि नावाचा विदेह देशाचा राजा. याने शालाक्यतंत्र तयार केले.

**विद्ध**–न., **सद्योव्रण० आशयेन विना यत्स्थानं निर्गतशल्यं वा स्यात् उन्नमितमुखं वा स्यात् तं विद्धं व्रणं विद्यात्** ( सुचि. २.१९-२० ) **इदमष्टविधम्–अनुविद्धम्, उत्तुण्डितम्, अतिविद्धम् निर्विद्धम्, अनुभिन्नम् भिन्नोत्तुण्डितम्, अतिभिन्नम्, निर्भिन्नम्** ( असंउ. ३१ ) **सुश्रुते पञ्चप्रकाराः– सिराविद्धः स्नायुविद्धः सन्धिविद्धः अस्थिविद्धो मर्मविद्धश्च** ( सुसू. २५.३६-४० )
सूक्ष्म टोकाचे शल्य आशयांशिवाय इतर ठिकाणी घुसले व कदाचित पडून गेले किंवा आत राहिले तर त्यामुळे झालेल्या अशा जखमेला विद्ध म्हणावे. त्याचे वाग्भटमते आठ प्रकार पाच प्रकार सुश्रुतमते त्यांची नावे वर दिली आहेत.

**( विद्धा )**–स्त्री., **क्षुद्ररोग० वातपित्ताभ्यां पद्मकर्णिकाकारा पिटिकाभिः आचिता पिटिका** ( असंउ. ३६ )
क्षुद्ररोग. वातपित्तामुळे कमळाच्या देठाच्या आकाराच्या बऱ्याच पुळ्यांनी व्यापलेली पुळी.

**विद्या**–स्त्री., **ज्ञानम् आयुर्वेदः** ( चसू. ३०.३१ )
ज्ञान, आयुर्वेद.

**–धर**–पु., **पारदादियोग० गन्धक–तालक–माक्षिक–ताम्रमनःशिला–पारदभस्मानि समभागानि दिनत्रयं पिप्पल्याः कषायेण स्नुहीक्षीरेण भावयित्वा निष्कार्ध–प्रमाणेन मधुना प्रातर्भक्षयेत् । तदनु च गोमूत्रं पिबेत् । असौ गुल्मं प्लीहानं च नाशयेत्** ( र. १८.६६-६८ )
विद्याधर हे सिद्धौषधाचे नाव. हा विद्याधररस गंधक, हरताल, माक्षिक, ताम्र, मनशीळ, पारदभस्म समभाग घेऊन तीन दिवस पिंपळीचा काढा, निवडुंगाचे दूध यांनी भावना द्याव्या म्हणजे तयार होतो. अर्धा मासा प्रमाणाने सकाळी मधाबरोबर घेऊन वर गोमूत्र द्यावे. याने गुल्म, प्लीहा बरी होते.
**देवयोनिविशेषः** ( सुसू. ६.२५ तः २८ )
देवाचे नाव.

**( –धरी )**–स्त्री., **देवयोनिविशेषजन्या स्त्री** (र. ३.३)
देवयोनीतील एक स्त्री.

**–धरयन्त्र**–न., **यन्त्र० चतुर्मुख्यां चुल्ल्यां स्थापितं रसपचनार्थं निर्मितं स्थाली–द्वितय–संपुटम् 'कोष्ठीयन्त्रम्' इत्यपराभिधम्** ( र. ९.२७-२८ )
चारही बाजूंनी लाकडे घालता येतील अशा चार तोंडाच्या चुलीवर पाऱ्याच्या पचनासाठी बनविलेला दोन शरावांचा ( परळांचा ) करंडा, याचेच दुसरे नाव कोष्ठीयंत्र.

**विद्युत्**–स्त्री., **तडित्** ( सुसू. ५.२५ ) वीज.

**–तुल्यवेदना**–स्त्री., **लक्षण० विद्युद्वत्क्षणमात्र–स्थायिनी वेदना** ( चचि. २४.१०२ )
विजेसारखी क्षणभरच रहाणारी चमकणारी वेदना.

**–पुञ्जवती**–स्त्री., **आटरूषः** ( र. १३.६८ )
ब्राह्मी ( र. १३.६८ ) ब्राह्मी.

**–प्रभा**–स्त्री., **विद्युत्प्रकाशः** ( सुशा. १०.४६ )
विजेचा प्रकाश.

**–सम्पात**–पु., **विद्युतः पतनम्, तडित्पातः** ( असंसू. ३२.७ ) वीज पडणे.

**( विद्युच् )–छिका**–स्त्री., **स्थावरविषान्तर्गतमूलविष०** ( सुक. २.५ )
एक स्थावर विष. मूल विष.

**(विद्युज्)–ज्वाला**–स्त्री., **वनस्पति० कलिकारी** ( रा. ४.१८ )
कळलावी.

**विद्रधि**–पु., स्त्री., **रोग० शीघ्रविदाहित्वात् विद्रधिरित्यभिधीयते** ( चसू. १७.९० ) **रक्तदोषजविकारेष्वेकः** ( सुसू. २४.९ ) **एकदेशोत्थितः उत्सेधप्रधानः आशुकारी शस्त्रकर्मसाध्यो रोगः** ( सुनि. ९.१ ) **तस्याधिष्ठानं मांसधरा नाम त्वक्** ( सुशा. ४.४ ) **सम्प्राप्तिः–प्रकुपिताः दोषाः त्वग्रक्तमांसमेदांसि प्रदूष्य अस्थि समाश्रित्य**

महामूलं रुजावन्तं वृत्तं घोरं शोफं जनयन्ति तं विद्रधिमाहुः ( सुनि. ९.४-५ ) बाह्याभ्यन्तर भेदेन द्विधा, दोषादिभेदेन अयं षड्विधः, वातजः पित्तजः श्लेष्मजः सान्निपातिकः क्षतजः ( अभिघातजः ) रक्तजश्चेति ( सुनि. ९.६ ) सामान्यलक्षणः–महामूलं रुजावन्तं वृत्तम् अथवा आयतं शोफं विद्रधिं वदन्ति ( सुनि. ९.४-५ ) तत्र वातजः, कृष्णारुणपरुषात्यर्थवेदनः चित्रोत्थान-प्रपाकश्च ( सुनि. ९.७ ) पित्तजः, पक्वोदुम्बरसङ्काशः श्यावः ज्वरदाहवान् क्षिप्रोत्थानप्रपाकश्च ( सुनि. ९.८ ) कफजः–शरावसदृशः पाण्डुः शीतः स्तब्धः अल्पवेदनः चिरोत्थानप्रपाकः सकण्डुश्च ( सुनि. ९.९ ) सान्निपातिकः–नानावर्णरुजास्रावः घाटालः विषमः महान् विषमपाकी च (सुनि. ९.१०-११) अभिघातजः–तैस्तैर्भावैरभिहते क्षतेः अपथ्यसेविनः वा वायुविसृतः क्षतोष्मा सरक्तं पित्तमीरयेत्। तदा ज्वरतृष्णादाहादीनि लक्षणानि भवन्ति, अयं अभिघातजः क्षतजः वा पित्तविद्रधिलक्षणयुक्तः आगन्तु-विद्रधिः इत्युच्यते ( सुनि. ९.११ तः १३ ) रक्तजः–कृष्ण-स्फोटावृतः श्यावः तीव्रदाहरुक्ज्वरयुक्तः पित्तविद्रधि-लक्षणयुतश्च ( सुनि. ९.१३-१४ ) आभ्यन्तर-विद्रधिः- गुर्वसात्म्यविरुद्धान्नशुष्कसंसृष्टभोजनाति-व्यायामव्यवायवेगाघातविदाहिभिः पृथक् सम्भूय वा कुपिताः दोषाः गुल्मरूपिणं वल्मीकवत्-समुन्नद्धमन्तः गुदे बस्तिमुखे नाभ्यां कुक्षौ वंक्षणयोः वृक्कयोर्यकृति प्लीन्हि हृदये क्लोम्नि वा विद्रधिं कुर्वन्ति। तेषां लक्षणानि आमपक्वावस्था च बाह्य-विद्रधिवत् जानीयात्। अधिष्ठानविशेषेण तस्य लिङ्गानि; यथा–गुदे वातनिरोधः, बस्तौ अल्पकृच्छ्र-मूत्रता, नाभ्यां हिक्काऽऽटोपः, कुक्षौ मारुतकोपनम् वंक्षणोत्थे विद्रधौ तीव्रकटीपृष्ठग्रहः, वृक्कयोः पार्श्व-सङ्कोचः प्लीन्हि उच्छ्वासावरोधनम्, हृदि तीव्र-सर्वाङ्गग्रहः दारुणशूलः, यकृति श्वासः तृष्णा च क्लोमजे-अधिका पिपासा ( सुनि. ९.१९ तः २२ ) साध्यासाध्यता-यः विद्रधिः मर्मोत्थः यदि आमः पक्वः वा महान् अल्पो वा सः कष्टसाध्यः ( सुनि. ९.२३ ) नाभेरुपरिजाः प्लीहयकृत्क्लोमकुक्षि-हृदयजाः पक्वाः ऊर्ध्वं स्रवन्ति, इतरे गुदबस्तिवृक्कवंक्षणजाः अधो यान्ति। एषु चाधो-निःसृतेषु जीवति नोर्ध्वनिःसृतेषु। हृन्नाभिबस्ति-जान् वर्जयित्वा येऽन्ये गुदकुक्षिवंक्षणवृक्कप्लीह-यकृत्क्लोमजास्तेष्वन्तर्विद्रधिषु बाह्यतो भिन्नेषु कदाचिद्दैववशाज्जीवेत् न पुनरितरेष्वभ्यन्तरतो भिन्नेष्वित्यर्थः ( सुनि. ९.२४-२५ ) त्रिदोषजः विद्रधिः हृन्नाभिबस्तिजः पक्वः असाध्यः ( सुनि. ९.३४ ) सर्वविद्रधयो वातादिना यदा-ऽस्थ्याश्रित्य जायन्ते उपेक्षणादनन्तरं तद्गतमज्जा च परिपच्यते। सः यदि भिन्नः तदा मेदःप्रभं स्निग्धं शुक्लं पूयं स्रवेत् (सुनि. ९.३८) उपद्रवाः–आध्मानं बद्धमूत्रता छर्दिः हिक्का तृष्णा रुक् श्वासश्च (सुनि. ३३.२२) चिकित्सासूत्रम्–अयं भेद्यो रोगः ( सुसु. २५.५ ) बाह्ये तु विद्रधौ अमर्मजाते पाचनपाटनशोधनादिरुपचारः करणीयः। आभ्यन्तर-विद्रधौ वरुणादिक्वाथ ऊषकादिकल्कं च पिबेत् रक्त-निमित्तजे तथा आगन्तुजे पित्तविद्रधिवत् चिकित्सां कुर्यात् ( सुसू. १६.२७-३४ ) अपक्वे मधुशिग्रुः।

विद्रधि, गळू. लवकर विदाह होतो म्हणून विद्रधि असे म्हणतात. हा रक्तदोषापैकीच एक विकार आहे. एका शारीर भागावर झालेला, त्वचेहून उंच उठून दिसणारा, त्वरित परिणाम करणारा असा हा शस्त्रसाध्य रोग आहे.

मांसधरा नामक त्वचेच्या आश्रयाने हा होतो. ह्या विकाराची संप्राप्ति–प्रकुपित दोष त्वचा रक्त मांस मेदाला दूषित करून अस्थींच्या आश्रयाने त्वचेचा मोठा भाग व्यापून पीडा करणारी बरीच खोल वाटोळी मोठी सूज उत्पन्न करतात. त्याला विद्रधि म्हणतात.

बाह्य व आभ्यंतर असे विद्रधीचे दोन प्रकार संभवतात. आणि वातज, पित्तज, कफज, सांनि-पातक, क्षतज, ( आघात वगैरे मुळे ) आणि रक्तज असे दोषादिभेदाने सहा प्रकार होतात. विद्रधीचे सामान्य लक्षण–बऱ्याच भागात खोल वाटोळी अथवा लांबट अशी सूज पीडायुक्त असणे म्हणजे विद्रधि. **वातज विद्रधि**—काळसर तांबूस कठोर अत्यंत वेदनायुक्त व अनेक उंचवटे असणारा व पिकणारा विद्रधि वातज होय. **पित्तज विद्रधि**—पिकलेल्या उंबराच्या रंगाचा तांबुस काळसर, ज्वर, दाह-युक्त असून उत्पत्ति आणि पिकण्याची क्रिया

लौकर होते. **कफज विद्रधि**—हा मातीच्या परळासारखा पसरट, पांढरा, थंड, ताठर व अल्पवेदनायुक्त असून याची वाढ आणि पिकण्याची क्रिया सावकाश होते व कंड असते असा हा कफविद्रधि असतो. **सांनिपातिक विद्रधि**—पीडा व स्रावांत नाना तऱ्हा आणि रंगही निरनिराळा व सुजेचा वरचा भाग मोठा असून त्याच्या सुजेचा आकारही विषम व मोठा असून लौकर किंवा उशिरा पिकतो असा विद्रधि सांनिपातिक होय. **अभिघातज**— निरनिराळ्या कारणांनी पडून अथवा मार लागून जखम झाली व तिच्याकडे दुर्लक्ष करून वागणे, वापरणे, खानपान अहितकारक केल्याने जखमेची उष्णता वायूमुळे वाढते व तो वायु रक्त व पित्ताला प्रेरणा देतो. तेव्हा ज्वर, तहान, दाह इ० लक्षणे होतात. हा अभिघातज विद्रधि होय. **हाच क्षतज विद्रधि** होय. पित्तज विद्रधीच्याच लक्षणांनी युक्त असतो. त्यालाच आगंतु विद्रधि असेही म्हणतात.

**रक्तज विद्रधि**— याची सूज काळ्या फोडांनी व्याप्त व काळसर असून अत्यंत तीव्र, दाह, पीडा व ताप आणि पित्तविद्रधीच्या लक्षणांनी युक्त असते.

**आभ्यंतर विद्रधि**— पचनास जड,न मानवणारे परस्पर विरुद्ध गुणधर्म युक्त अन्न पदार्थ सेवन, शुष्क व हीन दर्जाचे अन्न सेवन, अति व्यायाम, अति मैथुन, मलमूत्रादि वेगांचा अवरोध व विदाह कारक अन्य कारणांनी एक एक वा अधिक दोष कुपित होऊन व एकत्रित होऊन गोळ्याप्रमाणे वारुळाच्या आकाराची उंच होऊन आलेली, गुदाच्या आत, ओटी पोटाच्या तोंडाशीच, नाभी किंवा कुशी मध्ये जांघाड्यात दोन्ही बाजूस वृक्कांमध्ये ( मूत्रपिंड ? ) यकृत, प्लीहा, हृदय, क्लोम (जलवाही स्रोतसस्थाने) अशा कोणत्याही ठिकाणी विद्रधि उत्पन्न करतात, त्या सर्व विद्रधींची लक्षणे व त्यांची आमावस्था पक्वावस्था बाह्यविद्रधी प्रमाणेच समजावी. स्थानानुसार त्यांची लक्षणे अशी— गुदाच्या आत झाल्यास वायूचा अवरोध, ओटीपोटीच्या तोंडाशी झाल्यास थोडे थोडे कष्टाने लघ्वीला होणे, नाभीच्या ठिकाणी असता उचकी व पोटात गुडगुड, कुशीत असेल तर वायुप्रकोप, जांघाड्यात असेल तर कमर व पाठ अत्यंत जखडणे, वृक्कात असेल तर बरगड्या संकुचित झाल्यासारखे वाटणे, प्लीहेत असता उच्छ्वासाचा अवरोध, हृदयात असता संपूर्ण अंग अति जखडून भयंकर शूल होणे, यकृतात असता श्वास, व क्लोमात असता भयंकर तहान.

**साध्यासाध्यता**-मर्मस्थानी झालेला आम, पक्व, मोठा अथवा लहान कसाही असला तरी तो कष्टसाध्य; नाभीच्या वरील प्रदेशात प्लीहा, यकृत, क्लोम, कुक्षि वा हृदयात झालेल्या सर्व पक्व विद्रधीचा स्राव ऊर्ध्वभागातून होतो. गुद, बस्ति, वृक्क वंक्षणातील इतर विद्रधि पक्व झाल्यावर त्यांचा स्राव अधोमार्गाने होतो. यांतील अधोभागातून स्राव होणारे विद्रधि रोगी जगतात. ऊर्ध्वभागातून स्राव होणारे जगत नाहीत.

हृदय, नाभि आणि बस्ति या ठिकाणचे विद्रधि सोडून गुद, वंक्षण, कुक्षि, वृक्क, प्लीहा, यकृत, क्लोम या सारख्या अन्य ठिकाणच्या विद्रधींपैकी जे विद्रधि बाहेर फुटतात असे रोगी दैववशात् जगले तर जगतात. अर्थातच इतर अभ्यंतर विद्रधी आंत फुटले तरी जगण्याची आशा नसते.

त्रिदोषज विद्रधि हृदय, नाभि, बस्तिप्रदेशातील पक्व झाल्यास असाध्य; वातादि सगळेच विद्रधि जेव्हा अस्थीच्या आश्रयाने वाढतात तेव्हा उपेक्षा केल्यास अस्थीतील मज्जा पिकते, व जर तो विद्रधि फुटला तर मेदाच्या रंगाचा चिकट पांढरा पू स्रवू लागतो.

**उपद्रव**-पोट फुगणे, लघ्वी अडणे, वांती, उचकी तहान, पीडा, आणि श्वास हे उपद्रव होतात.

**चिकित्सा सूत्र**- हा शस्त्राने फोडण्यासारखा विकार आहे. मर्मरहित प्रदेशावर झालेल्या बाह्य विद्रधीला पिकवून चीर देऊन शोधनादी व्रण विषयक उपचार करावे. अपक्वावर शेवगा.

आभ्यंतर विद्रधीसाठी वरुणादिक्वाथ, आणि ऊषकादि कल्क प्यावा. रक्तज आणि आगंतु विद्रधीला पित्तविद्रधीप्रमाणे सर्व उपचार करावेत.

**विद्रावणी**-स्त्री., **वनस्पति० काकमाची** ( रा. ४.३६ ) कावळी.

**विद्रुम**-पु., **प्रवालम्** ( मुनि. २.१३ ) प्रवाळ, पोवळे.

**-लता**-स्त्री., **वनस्पति० नलिका** ( ध. ३.४३ ) पवारी ( सुगंधी द्रव्य ), गुलछबु, घेवडा.

**-लतिका**-स्त्री., **वनस्पति० नलिका** ( ध. ३.४३ ) पवारी ( सुगंधीद्रव्य ) गुलछबु, घेवडा.

**विद्वेष्य**–न., वनस्पति० कङ्कोलकम् (रा.१२.६९) कंकोळ.

**विधान**–न., तन्त्रयुक्ति० प्रकरणानुपूर्व्या अभिहितं विधानम्, यथाक्रममुक्तमित्यर्थः (सुउ. ६५.२९; चसि. १२.४३)

प्रकरणातील विषयाच्या ओघात क्रमाने सांगितलेले विधान, अनुक्रमाने केलेले विधान.

विधिः, क्रिया (सुउ. १०.३) क्रिया.

यज्ञकर्म (चवि. ३.२४) यज्ञकर्म.

**विधारण**–न., संधारणम्, निग्रहः (चसू. ७.१६)

धारण करणे, आवरणे, रोखून धरणे, अडवणे.

**विधार्यवेग**–पु., संधारणीयवेगः (चवि. ३.३८) यथा साहसम् अशस्तमनोवाक्कायकर्माणि, लोभशोकभयक्रोधमाननैर्लज्ज्येर्षातिरागाभिध्यायाश्च (चसू. ७.२६-२७)

विधारण करावयाचे वेग. जसे–अप्रशस्त अशी काया वाचा आणि मनाची कर्मे, साहस करावेसे वाटल्यास ते, लोभ, शोक, भय, क्रोध, मान, निर्लज्जपणा, मत्सर, अतिप्रेम व परनिंदा करण्याचा मोह हे वेग आवरावे.

**विधि**–पु., चिकित्सा (सुचि. २२.७२)

चिकित्सा, औषधोपचार.

सम्प्राप्तिभेदः, विधिश्च प्रकारो भेदः इत्यर्थः, यथा द्विविधा व्याधयो निजागन्तुभेदेन त्रिविधास्त्रिदोषभेदेन, चतुर्विधाः साध्यासाध्यमृदुदारुणभेदेन (चनि. १.१२.(४)

संप्राप्तीचा भेद. जसे व्याधी दोन प्रकारचा–निज आणि आगन्तु; तीन प्रकारचा त्रिदोषभेदाने; चार प्रकारचा साध्य, असाध्य, मृदु, दारुण, प्रकार वर्गीकरण.

विधानम्, कल्पना (चसू. २८.४२)

कल्पना, आचार.

यज्ञविधायको वेदः (चक. चवि. ३.२४)

यज्ञाचे विधान सांगणारा वेद.

प्रयोगः (सुसू. ३७.५) प्रयोग.

–**कोविद**–वि., विधिज्ञो (वैद्यः) (सुउ. ६२.३२)

विधि जाणणारा–प्रक्रिया जाणणारा (वैद्य).

–**ज्ञ**–त्रि., विधिं जानाति इति (चसि. ३.१२)

विधी जाणणारा.

–**नियमित**–वि., विधिः शास्त्रोक्तो नियमः तेन नियमितम् (अहसू. ८.५५)

शास्त्राने सांगितलेल्या नियमाने नियंत्रित.

–**भेद**–पु., विधि० (चवि. ८.८१) विधीचा प्रकार.

–**वत्**–अ., विधिः नाम शास्त्रम्। विधिवन्नाम शास्त्रपूर्वकं शास्त्रार्हं वा (चशा. ६.३४)

विधिवत् म्हणजे शास्त्राला योग्य किंवा शास्त्र पूर्वक.

–**विभ्रंश**–पु., विधिव्यापत् (असंसू. ३३.१०)

सांगितलेल्या विधीत होणारी चूक, चुकीच्या विधीमुळे होणारे अनिष्ट परिणाम.

–**विरुद्ध**–वि., नियमविरुद्धम् शास्त्रविरुद्धम् (चसू. २६.१०१)

नियमविरुद्ध. शास्त्राच्या विरुद्ध.

–**विशेष**–पु., विधानभेदः, उपक्रमभेदः (सुचि.१.४)

विधीचा विशेष–प्रकार, उपचाराचा प्रकार.

–**विहित**–वि., विधिना विहितम् शास्त्रविहितम् (चसू. २७.३)

विधीने सांगितलेली. शास्त्रोक्त, शास्त्राने ठरविलेले.

–**शोणितीय**–वि., अध्यायसंज्ञा० (चसू. २४.१)

अध्यायाचे नाव. रक्ताची माहिती यात आहे.

**विधुर**–न., मर्म० (असंशा. ७.२३)

मर्माचे नाव.

**(विधुरा)**–स्त्री., ग्रीवागतसिरा० (असंशा. ६.१५)

मानेमधील शीर.

–**मर्मन्**–न., मर्म० ऊर्ध्वजत्रुगतमर्म (सुशा. ६.६) शिरोमर्म, 'कर्णपृष्ठतोऽधःसंश्रिते' (सुशा. ६.२७) स्नायुमर्म, 'विधुरोत्क्षेपाः' स्नायुमर्माणि (सुशा. ६.२७) वैकल्यकरमर्म (सुशा. ६.१२-१३) विधुरे द्वे (सुशा. ६.६) मानम्–अर्धांगुलमितम् (सुशा. ६.२९)

शिरोमर्मामधील एक. कानाच्या पाठीमागे खाली आश्रय करून असणारे, स्नायुमर्म, गात्र विकल करणारे मर्म. प्रमाण–अर्धा अंगुल. दोन्ही बाजूला एक एक.

**विधूपन**–न., (परिव०) धूमायमानत्वम् (सुउ. २२.६)

धूर निघत असल्यासारखे वाटणे.

**विधूमाग्नि**–पु., निर्धूमाग्निः (कासू. २३.२७)

धूर नसलेला अग्नि.

**विधृत**–वि., धृतम् (अहसू. १३.३२) धारण केलेले.

**विधृति**–स्त्री., धारणम् (अहसू. ५.४४) धारण.

**विध्मापन**–वि., नाशनः नाम नाशकरः (हे.अहसू.१०.१२)

नाश करणारे.

**विध्वंसरस**–पु., सिद्धौषधि० टङ्कणेन सह गन्धकं जातीफलस्य क्वाथेन सप्तवारान्मर्दयेत् विसूचि-

**नाशकोऽयम्, मात्रा नवगुञ्जा । अनुपानं–सिता । पथ्यं–तक्रौदनः वास्तुकशाकं च** ( र. १६.११६ )
सिद्धौषधाचे नाव. विध्वंसरसामध्ये टाकणखार व गंधकाला जायफळाच्या काढ्याच्या सात भावना याव्यात, ह्याने विसूचिकारोग बरा होतो. प्रमाण नऊ गुंजा.

**विनता**–स्त्री., **रोग० प्रमेहपिटका० महती नीला अवगाढरुजाक्लेदा पृष्ठोदरान्यतराधिष्ठाना च भवति** ( चसू. १७.८३ )
एका प्रकारच्या प्रमेहपिटिकेचे नाव. ही पुळी मोठी, निळी, खोल, वेदना व स्रावयुक्त पाठ किंवा उदरावर होते.

**विनमन**–न., **आनतपृष्ठत्वम्, विशेषेण नमनम्** ( सुशा. ९.१२ )
पुढे वाकणे, विशेष ( अधिक ) वाकणे.
**यन्त्रकर्म० ऊर्ध्वं प्रविष्टशल्यस्य अधोनयनम्** ( सुसू. ७.१७ )
वर शिरलेल्या शल्याला खाली नेणे.

**विनम्र**–न., **वनस्पति० तगरम्** ( रा. १०.१०२ ) तगर.

**विनय**–पु., **इन्द्रियवशित्वम्** ( सुसू. २.३ )
इंद्रियनिग्रह, इंद्रियावर ताबा असणे.

**विनयोपपन्न**–वि., **जितेन्द्रियः** ( सुनि. ७.३ )
इंद्रियांच्या विषयाधीन न होणारा.

**विनाम**–पु., **विनमनम्, वक्रता** ( चनि. १.२१ ) **व्यथया शरीरनमनम्** ( चनि. १.३३ )
शरीर वाकविणे; वाकडेपणा, व्यथेने वाकडे होणे.

**विनामक**–वि., **रोगलक्षण० शरीरविनमनकारी** ( चसू. १४.२१ )
शरिराला वाकविणारे.

**( विनामिका )**–स्त्री., **रोगलक्षण० अन्तोच्छूना मध्यनिम्ना नाभिः** ( चशा. ८.४५ )
शेवटी उथळ व मध्ये खोल झालेली बेंबी.

**विनाशन**–वि., **मूलच्छेदनः** ( ड. सुसू. ३८.९ )
समूळ नाश.

**विनासिका**–स्त्री., **तन्नामकसविषकीट० तद्गुणाः–अग्निप्रकृतिकः, अयं पित्तरोगान् करोति** (सुक. ८.८-१२)
विनासिका नावाचा विषारी कीटक. हा पित्तप्रकृतीचा असून पित्तविकार करतो.

**विनिदाघ**–पु., **निदाघः । उष्णोपगमः दाह इति यावत्** ( र. १७.५८-५९ )
ग्रीष्म ऋतु. उन्हाळा. उष्मा होणे. दाह.

**विनिर्दहती**–स्त्री., **चित्रकः** ( सुउ. ४४.२८ ) चित्रक.

**विनिर्मथन**–न., (परिव०) **मथनम्** ( सुचि. ३८.३७ )
मंथन.

**विनिविष्ट**–वि., **प्रविष्टः** ( असंसू. ३४.३ )
प्रविष्ट. प्रवेशित.

**विनिःश्वसन**–न., **शब्दकरणम्** ( चचि. १९.५ )
शब्द करीत, सुस्कारा टाकीत.

**विनीत**–वि., **विनययुक्तः । शक्तिमान् इत्यर्थः** ( ड. सुक. १.१४ )
विनययुक्त, नम्र, बलवान.
**वनस्पति० दमनम्** ( रा. १०.१२० )
दमन, दवणा.

**विनोदविद्याधर**–पु., **पारदादियोग० पारदगन्धकटङ्कणानि तत्समभागानि जयपाल–बीजानि गृहीत्वा मर्दयित्वा च सम्पादितोऽयं योगः। तत्र अनुपानं–दुग्धं गुडश्च । सम्यग्विरेचनाभावे मुद्गक्वाथं तदाधिक्ये वा तक्रं बब्बूलीक्वाथं वा पिबेत् । फलं–ज्वरोदरार्शःशूलानां नाशः** ( र. १९.४,६ )
सिद्धौषधीचे नाव. विनोद विद्याधराची कृति–पारा, गंधक, टंकण समभाग जयपाल बीजासह घोटून गोळ्या कराव्यात. अनुपान–दूध, गूळ, चांगले विरेचन होण्यास द्यावे. चांगले विरेचन झाले नाही तर मुगाचे कढण, जास्त जुलाब झाले तर ताक किंवा बाभुळीचा काढा घ्यावा. **गुण**–ज्वर, उदर, मूळव्याध, शूलनाशक.

**विन्ध्य**–पु., **पर्वत० अत्र ‘चन्द्रमा’ इति सोमविशेष उपलभ्यते** ( सुचि. २९.२८ )
विंध्यपर्वत. यात चंद्रमा म्हणजे सोम ही दिव्य वनस्पती सापडते.

**विपक्वता**–स्त्री., **पक्वता** ( चसू. १३.५९ )
पिकावयास आलेले. फळास आलेले.

**विपक्ष**–वि., **हेतुविपरीतः ( भेषजादिः )** ( हे. अहसू. १२.५९ )
कारणांच्या विरुद्ध.

**विपद्**–स्त्री., **वैगुण्यम्** ( चसू. २५.२९ ) वैगुण्य.

**विपत्कर**–न., **जन्मतः तृतीयं नक्षत्रम्** ( असंनि. १.२१ )
विपत्ती उत्पन्न करणारे, जन्मनक्षत्रापासून तिसरे नक्षत्र.

**विपरिणमत्**–वि., **परिणमनमानम्** ( असंसू. ४.३ )
बदल होणारे, रूपांतरित होणारे.

**विपरिधावन**–न., लक्षण० विशेषेण समन्तात्–गमनम् ( ड. सुउ. ५६.७ )
विशेषे करून, सभोवार, इकडेतिकडे जाणे.

**विपरीत**–वि., विरुद्धम् ( अहृसू. १.१४ )
विरुद्ध – उलट गुणाचा.

**–गुण**–वि., विपरीतः गुणः यस्य सः ( आहारादिः ) ( चवि. १.७ )
ज्याचा गुण विपरीत आहे असा.

**–गुणभूयिष्ठ**–वि., विपरीताः गुणाः भूयिष्ठाः यस्मिन् सः ( आहारादिः ) ( चवि. १.७)
विरुध्द गुणांचे आधिक्य ज्यात आहे असा आहार इ०

**–व्यवाय**–न., विपरीतमैथुनम् ( पुरुषायितम् ) ( असंसू. ९.७० )
स्त्रीने पुरुषासारखे वर राहून पुरुषाशी केलेले मैथुन. उलटे मैथुन. अन्य द्वारी केलेले मैथुन.

**–स्वलक्षण**–वि., यत्र स्वस्य लक्षणं विपरीतमस्ति, विद्यमानं नास्ति इति यावत्, तत् ( अहृसू. १२.३९ )
स्वाभाविक हवामान बदललेला ऋतु.

**विपरीताभिनिवेश**–पु., विपर्ययेण ज्ञानम् ( चशा. ५.१० ) उलटे ज्ञान.

**विपरीताविपरीतव्रणविज्ञानीय**–वि., अध्यायसंज्ञा० ( सुसू. २८.१ )
या नावाचा अध्याय. यात प्राकृत विकृत व्रणाची लक्षणे आहेत.

**विपरीताविपरीतस्वप्ननिदर्शनीय**–वि., अध्यायसंज्ञा० ( सुसू. २९.१ )
या नावाचा अध्याय. यात अनुकूल प्रतिकूल ( मरणदर्शक ) स्वप्ने सांगितली आहेत.

**विपरीतेन्द्रियार्थ**–वि., रूपाद्यर्थाग्रहणभ्रान्तः ( सुनि. ८.६ )
रूपादिकांचे ग्रहण यथार्थ न होणे. संशय असणे.

**विपर्णाङ्कित**–वि., विगलितपत्रैः चिह्नितः ( सुसू. ६.३० ) पाने गळून गेलेला. निष्पर्ण.

**विपर्यय**–पु., क्षयः ( अहृसू. १.१४ ) क्षय, नाश. ऱ्हास. तन्त्रयुक्ति० यद् यत्र अभिहितं, तस्य प्रातिलोम्यं विपर्ययः । विपर्ययेण विपरीतमेव गम्यते, अर्थापत्त्या अविपरीत एव अर्थः प्रतीयते इति विपर्यय–अर्थापत्त्योः भेदः ( सुउ. ६५.२१; चसि. १२.४३ )
जेथे जे सांगितले जाते त्याच्या उलट ते विपर्यय. उदा० कृश, अल्पप्राण, भीरु पुरुष चिकित्सा करण्यास कठीण असतो. यावरून दृढशरिराचा, प्राणवान्, बेडर माणूस सुचिकित्स्य असतो. असा अर्थ घेणे हा विपर्यय होय, केलेल्या विधानाच्या वाच्यार्थाशी सुसंगत असा पण भिन्न अर्थ घेणे ही अर्थापत्ति होय; विपर्यय आणि अर्थापत्तीमध्ये हाच भेद आहे.

**विपश्चित्**–वि., विद्वान्, ज्ञाता (सुचि. ३८.९-१० )
विद्वान, ज्ञाता.

**विपाक**–पु., जाठराग्निना संयोगाद्रसपरिणामान्ते यद् रसान्तरमुत्पद्यते स विपाकः ( अहृसू. ९.२० ) चरके त्रिधा विपाकः वर्तते कट्वम्लः मधुरश्च । तत्र कटुतिक्तकषायरसानां विपाकः, प्रायशः कटुर्भवति, अम्लस्य अम्लो, मधुरः स्वादुलवणयोः ( चसू. २६.५७-५८ ) सुश्रुते 'आगमे हि द्विविध एव पाको मधुरः कटुकश्च । तयोर्मधुराख्यो गुरुः कटुकाख्यो लघुरिति । तत्र पृथिव्यप्तेजोवाय्वाकाशानां द्वैविध्यं भवति गुणसाधर्म्याद्गुरुता लघुता च भवति, पृथिव्यापश्च गुर्व्यः, शेषाणि लघूनि तस्माद् द्विविध एव पाक इति ( सुसू. ४०.१० ) वीर्यात् विना पाको नास्ति ( सुसू. ४०.१५ ) विपाककर्माणि–मधुराम्ललवणरसाः स्निग्धस्वभावात् वातमूत्रपुरीषानुलोमनकराः कटुतिक्तकषायास्तु रूक्षस्वभावात् वातविण्मूत्ररेतसां विबंधकराः । विपाकस्य रसतुल्यफलत्वात् ( अहृसू. ९.२२ ) मधुरविपाकः सृष्टविण्मूत्रकरः कफशुक्रलश्च; अम्लविपाकः पित्तकृत् सृष्टविण्मूत्रः शुक्रनाशनः कटुविपाकः वातलः बद्धविण्मूत्रः शुक्रघ्नश्च (चसू. २६.६१-६२) विपाकः कर्मनिष्ठया उपलभ्यते ( चसू. २६.६६ ) नैसर्गिकं बलम्–विपाकः रसं हन्ति तौ वीर्यं, तान् प्रभावो व्यपोहति ( अहृसू. ९.२५ )

जठरातील अग्नीच्या संयोगाने रसाचे पचन झाल्यावर अन्य रसात होणारे जे रूपांतर त्यास विपाक म्हणतात. तिखट, कडू आणि कषाय रसांचा विपाक बहुधा तिखट होतो. चरकात तीन विपाक सांगितले आहेत. आंबट रसाचा विपाक बहुधा आंबट, गोड आणि खारट या रसांचा विपाक गोड होतो. तुरट, कडू व तिखट यांचा तिखट होतो. सुश्रुतात दोन विपाक आहेत. गोड व तिखट. मधुर हा जड व तिखट हा हलका. पृथ्वी इ० पंचमहाभूतांचे गुरु व लघु या गुण साधर्म्याने दोन प्रकार होतात. पृथ्वी व जल गुरु ( जड ) व इतर तीन लघु ( हलके )

म्हणून पाक दोन प्रकारचाच होतो. वीर्यावाचून पाक नाही.

**विपाकाचे कार्य**—मधुर, अम्ल, लवणरस, स्निग्ध स्वभावामुळे वात मूत्र पुरीष यांचे अनुलोमन करणारे आहेत. कटु तिक्त कषाय हे रूक्ष स्वभावामुळे शुक्र वात मूत्र पुरीषांचा विबंध (अवरोध) करणारे आहेत. विपाकाचे कार्य रसाप्रमाणे होते म्हणून गोड विपाक मलमूत्र साफ करतो व कफ आणि शुक्र वाढवितो. आंबट विपाक पित्तकर मलमूत्र साफ करणारा व शुक्रनाशक. तिखट विपाक वातुळ मलमूत्रांचा अवरोध व शुक्रनाश करतो. विपाक हा त्याच्या कर्मांच्या अंतिम परिणामावरून ओळखला जातो. नैसर्गिक बल–विपाक रसाला दोघांना वीर्य व तिघांना प्रभाव नष्ट करतो.

**विपाचन**–न., **पाचनम्** ( सुचि. ४.३३ )
पचन.

**विपाण्डु**–पु., **वनस्पति० त्रपुसम्** ( ध. १.१७५ )
काकडी.

**विपादि**–स्त्री., **रोग० क्षुद्रकुष्ठ० विपादिका** (अहृसू. २७.१६)
विपादिका, क्षुद्रकुष्ठ.

**(विपादिका)**–स्त्री., **रोग० अशीतिवातविकारेष्वेकः, तत्र लक्षणम्–पाणिपादस्फुटनम्** ( चसू. २०.११ )
ऐशी वातविकारांपैकी एक. हातापायाला भेगा पडणे, हातपाय फुटणे.
**रोग० क्षुद्रकुष्ठेष्वेकः वातकफात्मकः** (चचि.७.२९) **लक्षणम्– कण्डूदाहरुजायुक्तः पादस्फुटनम्** ( सुनि. ५.१३ ) **तीव्रार्ति–मन्दकण्डूसराग-पिटिकाचिताः पाणिपाददार्याः** ( असंनि. १४.२५ ) **चिकित्सा–जीवन्ती मञ्जिष्ठा दार्वी कम्पिल्लकः तुत्थं पयश्च इत्येतैः कृतः घृततैलपाकः सर्जरस-मधूच्छिष्टावापयुक्तः विपादिका–कुष्ठे अभ्यञ्जनेन शामको भवति ।** (चचि. ७.१२१ )
क्षुद्र कुष्ठांपैकी एक. हा वातकफात्मक आहे. ह्या विकारात पायाला भेगा पडतात त्या ठिकाणी मंद खाज, दाह, तीव्र ठणका व लाल पुळ्यांनी पाय व्याप्त असतो. त्यावर जीवन्ती, मंजिष्ठा, दारुहळद, कपिला, मोरचूद, दूध यामध्ये तयार केलेले व राळ व मेण यांचे मिश्रण नंतर घातलेले तूप किंवा तेल लावावे म्हणजे ते विपादिका कुष्ठाचे शमन करते.

**विपादी**–स्त्री., **रोग० विपादिका** (र.२०.९२-९७)
विपादिका रोग.

**विपाना**–स्त्री., **आसुत० सुरा** ( रा. १४.३०३ )
सुरा, दारू.

**विपुलशिरस्**–वि., **महाशिराः (मूढगर्भः** (मा. ४)
मोठे डोके असणारा ( अडलेला गर्भ ).

**विपुलस्रवा**–स्त्री., **वनस्पति० कुमारी** ( रा. ५.११ )
कोरफड.

**विपुलैकदारिन्**–वि., **' अनेक प्रकारेण दीर्यते '** ( सुनि. १५.१० )
अनेक प्रकारांनी विदीर्ण, पुष्कळ प्रमाणात करणारे, फोडणारे.

**विपुषा**–स्त्री., **वनस्पति० हपुषा** ( ध. २.९ ) खडशेरणी.

**विपूयक**–पु., **' दुर्गन्धता '** ( ड. ) **'विपूयक इति विशेषेण पूययोगित्वम्** ( मधुकोशे; सुनि.५.२३ )
दुर्गंधत्व. पू होणे व त्यामुळे दुर्गंध.

**विप्र**–पु., **वनस्पति० पिप्पलः** ( ध. ५.७९ ) पिंपळ.
**–काष्ठ**–पु., **वनस्पति० तूलम्** ( रा. ९.८७ )
तूती. रुई, सावरी, कापूस.

**विप्रकीर्ण**–वि., **विकीर्णम् , प्रक्षिप्तम्** ( अहृसू.१.४ )
सर्वत्र खूप विखुरलेले, पसरलेले.

**विप्रकृति**–स्त्री., **विपरीतस्वभावः** ( सुशा. २.४५ )
विपरीत स्वभाव.

**विप्रकृष्टवृत्ति**–वि., **दूरस्थग्रहणशीलानि मनश्चक्षुरादीनि** (काशा)
दूरचे ग्रहण करण्याचा स्वभाव असलेले मन डोळे इत्यादी.

**विप्रतिपत्ति**–स्त्री., **विरुद्धज्ञानम् , विपरीतज्ञानम्** ( चवि. ७.८ )
विरुद्ध ज्ञान. विपरीत ज्ञान.

**विप्रतिपन्न**–वि., **संशयमापन्नः** ( चवि. ७.४ )
संशयग्रस्त.

**विप्रतिपादन**–न., ( परिव० ) **विरुद्धकथनम्** ( अहृसू. १२.७० )
विरुद्ध सांगणे.

**विप्रतिवाद्**–पु., **एकस्मिन् विषये मतान्तरम्** ( चशा. ६.२१ )
एका विषयातील मतभेद.

**विप्रत्यय**–पु., **विपरिताभिनिवेशः** ( चशा. ५.१० )
विशेष गोष्टींचे विपरीत स्वरूपात ग्रहण करणे, भलतीच

चुकीची समजूत करून घेणे. विपरीत स्वरूपाचा दुराग्रह.

**विप्रलम्भिन्**–पु., **वनस्पति० किङ्किरातः** ( ध.५.१५६ ) सुरंगी.

**विप्रलाप**–पु., **विविधप्रकारेण विलपनं नाम जल्पनम्** ( सुउ. ४८.७ )
विविध प्रकाराची बडबड.

**विप्रसारणशील**–वि., **संकोचनशीलः** ( सुसू. ३१.१३ )
पाय संकुचित करून झोपणारा, पाय पोटाशी घेऊन झोपणारा.

**विप्राङ्गी**–स्त्री., **वनस्पति० कटुका** ( ध. १.३८ ) कुटकी.

**विप्रिय**–वि., **द्विष्टम्** ( अहसू. १२.३७ )
तिटकारा असलेले.

**विप्लुत**–वि., **व्याकुलः संकटमग्नः** ( चसि. ८.३ )
व्याकुळ, संकटमग्न.
**विकृतम्** ( ड. सुउ. ५७.६ ) विकृत.
**प्रसरणशीलम्** ( चचि. १९.५ )
पसरण्याची प्रवृत्ति असलेले.
**सर्वतः अवकीर्णम्** ( सुउ. ७.२३ )
सर्वत्र पसरलेले.

( **विप्लुता** )–स्त्री., **योनिरोग० लक्षणानि–पिच्छिला स्राविणी योनिः** ( चचि. ३०.८१-८२ ) **नित्यं वेदनायुक्ता शूलादियुता च** ( सुउ. ३८.१० ) **अधावनात्संजातजन्तुः कण्डूला च भवति योनिः कण्ड्वा च अतिरतिप्रिया भवति** ( असंउ. ३८ )
विप्लुता नावाचा योनिरोग. **ह्या रोगाची लक्षणे**–योनिमार्गातून बुळबुळीत स्राव, नेहमी वेदना, शूल, न धुतल्यामुळे जन्तु होणे, खाज सुटणे व कंडूमुळे अतिमैथुनाची आवड.

**विफला**–स्त्री., **वनस्पति० केतकी** ( रा. १०.१ ) केवडी.

**विबद्ध**–वि., **अवरुद्धम्** ( सुउ. ५६. २० ) अडवलेले.
**–दोष**–पु., **स्तम्भितवातादिदोषः। संगृहीतवातादिदोषः** ( सुउ. ४०.२९-३० ) **अप्रवृत्तदोषः** ( सुउ. ३९.१४४ )
अडलेले वातादि दोष.
योग्य मार्गाला प्रवृत्त नसलेले वातादि दोष.
**–मार्ग**–पु., **अवरुद्धमार्गः** ( चचि. ८.५८ )
बंद असलेला मार्ग, अडलेला मार्ग.

**विबन्ध**–पु., **लक्षण० अप्रवृत्तिः** ( सुउ. ४०.१०७ चसू. २.१३ ) न सुटणे, अडथळा होणे.
**अनुबन्धः** ( सुउ. ५१. ४९-५० ) बरोबर असणे, **बन्ध० अयमुदरोरूपृष्ठे योजनीयः** ( सुसू.१८.१७ )
एक बंध. हा उदर, पाठ, मांडी यांवर बांधतात.

**विभक्त**–वि., **विभागं प्रापितः, पृथक्कृतः** (असंसू. ८.६३)
वेगळा केलेला.
**–गात्रत्व**–न., **विभागेन स्थितगात्रत्वम्** ( अरु. )- **सुसन्निविष्टावयवत्वम्** ( हे. अहसू. २.१० )
रेखीव व सुटसुटीत अवयव असणे. योग्य ठिकाणी व्यवस्थित अवयव असणे.

**विभक्ति**–स्त्री., **विभागः** ( सुशा. ७.१; चसू. २६.११० )
विभाग.

**विभजन**–न., **विभागीकरणम्** ( सुशा. ५.३ )
विभाग करणे.

**विभाग**–पु., **विभक्तिः** ( चसू. २६.२९ ) विभाग.
**एकदेशः** ( चवि. ४.४ )
एखादा भाग, अनेकांपैकी एक अंश.

**विभाण्डी**–स्त्री., **वनस्पति० आवर्तकी** ( ध. १.१९८ )
चांभारआवळी.

**विभावन**–न., **चिन्तनम्** ( सुशा. १०.३३ ) चिन्तन.
**ज्ञानम्, बोधः** ( असंसू. १०.२५ ) ज्ञान, बोध.
**व्याख्यानैः कथनम्**, अर्थ स्पष्ट करणे.

(**विभावना**)–स्त्री., **भावना, शुष्कद्रव्यं द्रवेऽभिमिश्र्य तस्य शोषणावधि खल्वे मर्दनम्** ( र. २.१५० )
भावना. शुष्क द्रव्य पाण्यात किंवा काढ्यात घालून, ओले करून नंतर सुकेपर्यंत खलात घोटणे.

**विभाषा**–स्त्री., **विविधं भाष्यते इति, पर्यायशब्दैः कथ्यते इति** ( सुउ. ४४.६ )
नाना प्रकारांनी बोलले जाते. पर्याय शब्दांनी सांगितले जाते.

**विभीतक**–पु., **वनस्पति० बिभीतकः** ( ध. १.२१२ )
बेहेडा.

**विभु**–पु., **आत्मा अविनाशिस्वरूपः** ( चशा. ४.८; सुशा. ५.५० )
आत्मा, अविनाशस्वरूपी.
**रोग० सन्निपातज्वरभेदः, कफपित्ताधिकः, तल्लक्षणानि–अन्तर्दाहः बहिःशीतं तन्द्रा दक्षिणपार्श्वतोदः उरःशीर्षगलग्रहः कफपित्तनिष्ठीवनं तृष्णा कण्डूविड्भेदश्वासहिक्काः सप्रमीलकाः** (मा.ज्वरनि.) ( मधुकोष. )
सान्निपातिक ज्वराचा भेद. त्याची लक्षणे–अंतर्दाह बाहेरून थंड, डोळ्यांवर झापड, उजव्या बरगड्यात शूल. छाती, डोके व गळा जखडणे, कफपित्तमिश्र

थुंकी पडणे, तहान, खाज, मळ पातळ होणे, श्वास व उचकी या विकारांत डोळे मिटून पडावेसे वाटते.

**-त्व**-न., **शक्तत्वम्, विषयग्रहणसामर्थ्यम्** ( चसू. ८.१४ )

विषयाचे ग्रहण सामर्थ्य.

**विभूति**-स्त्री., **व्यक्तिः, मूर्तिः** ( चशा. ५.५ )

व्यक्ति, मूर्ति.

**विभ्रंश**-पु., **अवनतिः, नाशः** ( सुचि. ३४.७ ) नाश.

**विस्रंसः, स्वस्थानच्युतिः** ( चसि. २,१५; चसू. १५.१३ )

स्वतःच्या स्थानापासून ढळणे. नष्ट होणे.

**विपरीतप्रवृत्तिसामर्थ्यम्** ( चसि. ६.३९ )

उलट प्रवृत्तींचे सामर्थ्य.

**विभ्रम**-पु., **विविधः भ्रमः, संमोहमदापस्मारोन्मादादिकः मानसविकारः** ( सुचि. ३९.२५ )

विविध प्रकारचे भ्रम. संमोह, मद, अपस्मार, उन्माद इ० मनोविकार.

**व्यापद्०** (सुउ. ५५.४०) विकृती (मन व श्रवणाची).

**क्षोभः** ( अहसू. २९.३८ ) खळबळ, दुष्टि.

**विभ्रान्त**-वि., **भ्रान्तः** ( चसू. २७.२०७ )

गोंधळलेला.

**-काल**-पु., **अकालः मिथ्याकालो वा** (चसू. २७.२० )

अवेळ, भलतीच वेळ.

**-दर्शन**-वि., **भ्रांतियुक्तं दर्शनम्** ( असंशा. ९.११ )

संशयित दृश्य.

**-बिल**-वि., **रुद्धद्वारः** ( चसि. ९.४८ )

ज्याचा मार्ग अडलेला आहे असा.

**-मानस**-वि., **विक्षिप्तचेताः** ( सुउ. ४६.१२ )

चमत्कारिक मनःस्थितीत असलेला.

**-लोचन**-वि., **अत्यन्तघूर्णिताक्षः ( नरः )** ( सुसू. ३३.१७ )

अत्यंत गोंधळलेली दृष्टि असलेला (माणूस) ज्याचे डोळे अत्यंत गरगर फिरत आहेत असा.

**विमर्दक**-न., **वनस्पति० चक्रमर्दः** ( रा. ४.८ )

तरोटा, टाकळा.

**विमर्दन**-पु., **उपक्रम० मर्दनम्** ( अहसू. १३.११ )

एक चिकित्सा, रगडणे.

**विमल**-पु., न., **खनिजद्रव्य० महारसेष्वेकम्** (ध. ६.१) **तपतीतीरे अयं लभ्यते। विमले अष्टास्रफलक-वृत्तत्वानि भवन्ति; हस्ते घर्षणेन करे कालिमा-विकरत्वं च न भवति। तस्य भेदाः—हेमविमलः रूप्यविमलः कांस्यविमलश्च। तस्य गुणाः—कटुः तिक्तः उष्णोऽतिरसायनो वातपित्तघ्नस्त्वग्दोष-व्रणनाशनश्च** ( ध. ६.६ ) **माक्षीकभेदः** ( र. २.१ )

एक खनिज द्रव्य. महा रसातील एक द्रव्य. हे तापी-नदीच्या कांठी सापडते. अष्टकोनी गोलाकार असून हातावर घासल्याने काळी रेषा उमटत नाही. हेम विमल, रूप्य विमल, कांस्य विमल, असे प्रकार आहेत. गुण— तिखट, कडू, उष्ण, उत्तम रसायन, वात पित्त नाशक, त्वचा रोग नाशक, व्रण नाशक आहे. हा माक्षिकाचा प्रकार आहे.

**अभ्रकम्** ( ध. ६.३४ ) अभ्रक.

**( विमला )**-स्त्री., **वनस्पति० सातला** ( ध. १.२३८ )

शिकेकाई.

**विमलेन्द्रियता**-स्त्री., **करण-पाटवम्** ( असंसू. २४.१९ )

इंद्रिये कार्यक्षम असणे, इंद्रिये शुद्ध असणे.

**विमान**-न., **विशेषेण मीयते ज्ञायते दोषभेषजाद्यनेन इति** ( चवि. १.१ )

दोष व औषधाचे विशेष ज्ञान ज्याकडून होते ते विमान.

**चरकसंहितायां स्थान० अस्मिँस्थानेऽष्टाऽध्याया वर्तन्ते, अत्र सूत्रादिस्थानोक्तविषयाणां विशेष-विचारः कृतः** ( चवि. १.१ )

चरकसंहितेमधील एका स्थानाचे नाव. यात आठ अध्याय आहेत. यात सूत्रस्थानादि स्थानात सांगि-तलेल्या विषयांचा विशेष विचार केला आहे.

**-ता**-स्त्री., **विवृद्धमानता, प्रमाणवृद्धिः इति यावत्** ( चचि. ३०.२०८ )

प्रमाणाधिक्य. प्रमाणाने झालेली वाढ.

**विमानना**-स्त्री., **खण्डितत्वम्, अवधारणा** (सुशा. ३,२१)

न मानणे, अपमान करणे, तिरस्कार करणे

**विमार्ग**-पु., **विरुद्धो मार्गः** ( सुउ. ३९.२३ )

विरुद्ध मार्ग.

**-ग**-वि., **तिर्यग् गतः** ( ड. सुउ. ३९.२३ )

तिरका गेलेला.

**-गमन**-न., **विपरीतमार्गे गमनम्** ( चवि. ५.२४ )

उलट किंवा विरुद्ध मार्गाला जाणे.

**-दृष्टि**-वि., **दैत्यजुष्टलक्षण० विमार्गदर्शनः नास्तिकः** ( ड. सुउ. ६०.९ )

नास्तिक भाव उत्पन्न होणे. हे दैत्यग्रहाने पछाड-ल्याचे चिन्ह.

**-स्थ**-वि., विरुद्धे मार्गे स्थितः ( चचि. २८.१२ )
विरुद्ध मार्गात असलेला.

**विमुक्तकण्ठ**-वि., **गिलनकर्मणि अस्वाधीनः कण्ठो यस्य सः** ( सुनि. १६.६१ )
मिळण्याची क्रिया स्वाधीन नसलेला गळा ज्याचा आहे असा.

**विमुक्तगर्भशल्या**-वि., **विमुक्तं गर्भरूपं शल्यं यस्याः, सा सद्यःप्रसूता** ( चशा. ८.३१ )
बाळंतीण, जिचे गर्भरूप शल्य निघाले आहे अशी, नुकतीच प्रसूत झालेली.

**विमुक्तत्व**-न., **मोक्षः** ( सुसू. ३२.४ ) मोक्ष.

**विमुख**-वि., **पराङ्मुखम्** ( चवि. ८.२५ ) पराङ्मुख.

**विमूर्च्छित**-वि., **बहुशो भृष्टम्** ( अहसू. ७.४३ )
पुष्कळ वेळा भाजलेले.

**विमृदितकर्ण**-वि., **संकुचितकर्णम्** ( सुसू. २७.१६ )
शल्य सहज निघावे यासाठी ज्याचा कान म्हणजे फाटा दुमडला आहे असे शल्य.

**विमोचन**-न., (परिव०) **मोक्षणम्** ( सुशा. २.३१ )
सोडणे.

**विम्लापन**-न., **व्रणस्योपक्रम० अङ्गुष्ठलोहोपलवेणुदण्डैः कोष्णैः मर्दनम्** ( सुचि. १८.१२-१३ )
व्रणावरील एक उपचारविशेष; अंगठा, लोखंडी ठोकळा किंवा वेळूचा दांडा गरम करून घोटणे.

**वियव**-पु., **पुरीषजकृमि०** ( सुउ. ५४.८ )
मलातील कृमि. जंत.

**वियोग**-पु., **विभागः** (चशा. ५.८ ) षड्धातूंचा वियोग.

**वियोनि**-वि., **योनिः कारणं, तद्रहितः, निर्हेतुकः** ( चइ. २.१६ )
योनि म्हणजे कारण. कारणाशिवाय. हेतु नसलेला, स्वभावतः, अकारण.
स्त्री., **हस्तजङ्घान्तरम्** ( सुनि. १२.७; गयी. )
योनीव्यतिरिक्त हात अथवा मांड्या वळवून उत्पन्न होणारी पोकळी.

**विरङ्ग**-न., **खनिजद्रव्य० कङ्कुष्ठम्** ( ध. ३.१४१ ) कंकुष्ठ.

**विरल**-न., **दधि** ( रा. १५.२४५ ) दही.

**(विरला)**-स्त्री., **वनस्पति० तिन्दुकः** ( असंसू. १६.३५ )
टेंभुर्णी.

**विरस**-वि., **विगतरसम्** ( सुसू. ४५.१४ )
रस नाहीसे झालेले.
**विरुद्धरसं, अनिष्टरसं वा** ( सुसू. ४५.१९८-२०० )
विरुद्ध किंवा अनिष्ट रसाचे,

**-काय**-पु., (परिव०) **अनिष्टरसयुक्तं शरीरम्** ( चइ. २.२१ )
अपायकारक रसयुक्त शरीर. ( मुंग्या माशा इ०ना नको असलेला व उवा लिखांना इष्ट ).

**-क्षीरा**-वि., **विरसस्तन्या, यस्याः स्तन्ये वैरस्यं सञ्जातं सा (स्त्री)** ( चचि. ३०.२६३-२६४ )
विकृत रुचीचे दूध असलेली स्त्री; जिच्या दुधाचा मूळचा रस विकृत झाला आहे अशी स्त्री.

**विरसाननत्व**-न., **मुखवैरस्यम्** ( सुउ. ५७.४ )
तोंड बेचव होणे.

**विरसिका**-स्त्री., **यूष० मुद्गतक्राम्लसिद्धः यूषः** ( काखिल. ४.३५ )
मूग, ताक व अम्ल द्रव्यांनी तयार केलेले कढण.

**विराम**-पु., **विश्रांतिः** ( चसू. २१.२९ )
आराम, विश्रान्ती.

**विरिक्त**-वि., **कृतविरेचनः** ( सुचि. ३९.३ )
ज्याला विरेचन उपचार करविला आहे असा.

**( विरिक्ता )**-स्त्री., **विरेचनेन सम्यग्जातविरेका** ( चचि. ३०.२५६ )
रेचकानें जिला योग्य विरेचन झाले आहे अशी.

**-क्रम**-पु., **पेयादिक्रमः** ( सुउ. ५६.२७ )
क्रमशः पेज वगैरे देण्याची योजना.

**-शिरस्**-वि., **कृतशिरोविरेचनः** ( सुउ. २१.५७ )
शिरोविरेचन केलेला.

**विरिजपत्रिका**-स्त्री., **वनस्पति० नाकुली** ( ध. ४.१०३)
मुंगुसवेल.

**विरुद्ध**-वि., **यत्किञ्चिद्द्रव्यं दोषमुत्क्लेशयति न तु निर्हरति, तत्सर्वं विरुद्धम्** (हे.अहसू. ७.४५) **यथा- सर्वानेव मत्स्यान्न पयसा सहाभ्यवहरेद्विशेषतस्तु चिलिचिमं, स हि महाभिष्यन्दित्वात् स्थूललक्षण- तरानेतान् व्याधीनुपजनयत्यामविषमुदीरयति च । ग्राम्यानूपौदकपिशितानि च मधुतिलगुडपयोमाष- मूलकबिसैर्विरूढधान्यैर्वा नैकध्यमद्यात् तन्मूलं हि बाधिर्यान्ध्यवेपथुजाड्यकलमूकतामैण्मिण्यमथवा मरणमाप्नोति । न पौष्करं रोहिणीकं शाकं कपोतान् वा सर्षपतैलभृष्टान्मधुपयोभ्यां सहाभ्यवहरेत्, तन्मूलं हि शोणिताभिष्यन्दधमनीप्रतिचयापस्मारशंखक- गलगण्डरोहिणीनामन्यतमं प्राप्नोत्यथवा मरणमिति। न मूलकलशुनकृष्णगन्धार्जकसुमुखसुरसादीनि भक्ष- यित्वा पयः सेव्यं, कुष्ठाबाधभयात् । न जातुकशाकं**

न निकुचं पक्कं मधुपयोभ्यां सहोपयोज्यम्, एतद्धि मरणायाथवा बलवर्णतेजोवीर्योपरोधायालघुव्याधये षाण्ढ्याय च भवेत्। तदेव निकुचं पक्कं न माषसूपगुडसर्पिर्भिः सहोपयोज्यं वैरोधिकत्वात्। तथाऽऽम्राम्रातकमातुलुङ्गनिकुचकरमर्दमोचदन्तशठबदरकोशाम्रभव्यजाम्बवकपित्थतिन्तिडीकपारावताक्षोडपनसनालिकेरदाडिमामलकान्येवंप्रकाराणि चान्यानि द्रव्याणि सर्वं चाम्लं द्रवमद्रवं च पयसा सह विरुद्धम्। तथा कङ्गुवनकमकुष्ठककुलत्थमाषनिष्पावाः पयसा सह विरुद्धाः। पद्मोत्तरिकाशाकं शार्करो मैरेयो मधु च सहोपयुक्तं विरुद्धं वातं चातिकोपयति। हारिद्रकः सर्षपतैलभृष्टो विरुद्धः श्लेष्माणं चातिकोपयति। उपोदिका तिलकल्कसिद्धा हेतुरतीसारस्य। बलाका वारुण्या सह कुल्माषैरपि विरुद्धा, सैव शूकरवसापरिभृष्टा सद्यो व्यापादयति। मयूरमांसमेरण्डसीसकावसक्तमेरण्डाग्निप्लुष्टमेरण्डतैलयुक्तं सद्यो व्यापादयति। हारिद्रकमांसं हारिद्रसीसकावसक्तं हारिद्राग्निप्लुष्टं सद्यो व्यापादयति; तदेव भस्मपांशुपरिध्वस्तं सक्षौद्रं सद्योमरणाय कल्पते। मत्स्यनिस्तालनसिद्धाः पिप्पल्यस्तथा काकमाची मधु च मरणाय स्यात्। मधु चोष्णमुष्णार्तस्य च मधु मरणाय। मधुसर्पिषी समधृते, मधु वारि चान्तरिक्षं समधृतं, मधु पुष्करबीजं, मधु पीत्वोष्णोदकं, भल्लातकोष्णोदकं, तक्रसिद्धः कम्पिल्लकः पर्युषिता काकमाची, अङ्गारशूल्यो भासश्चेति विरुद्धानि (चसू. २६.८४) यत् देशकालाग्निमात्रासात्म्यानिलादिभिः तथा संस्कारतः वीर्यतः कोष्ठतः अवस्थातः क्रमतः परिहारतः पाकतः संयोगतः विरुद्धम् हृद्विरुद्धं संपद्विरुद्धं विधिविरुद्धं तत् सर्वमहितमिति जानीयात्। यथा—जाङ्गले देशे रूक्षतीक्ष्णादिभेषजं तथानूपे स्निग्धशीतादि एतद् देशविरुद्धम्। शीतकाले शीतरूक्षादिसेवनं तथा उष्णे कटुकोष्णादिसेवनमेतत् कालविरुद्धम्। चतुर्विधेऽनले यद् विरुद्धमाहारादिकं तदग्निविरुद्धम्। समधृतमधुसर्पिः मात्राविरुद्धम्। कटुकोष्णादिसात्म्यस्य यत् स्वादुशीतसेवनं तत् सात्म्यविरुद्धम्। या समानगुणाभ्यासविरुद्धान्नौषधक्रिया साऽनिलादिभिः विरुद्धा। संस्कारतः विरुद्धं तद्, यद् भोज्यं विषवद् भवेत्। यत् शीतवीर्यं द्रव्यस्य उष्णवीर्यद्रव्येण सह सेवनं, तद् वीर्यविरुद्धम्। यत् क्रूरकोष्ठस्य अत्यल्पं मंदवीर्यमभेदनं भेषजसेवनं तथा मृदुकोष्ठस्य गुरुभेदनीयं तत् कोष्ठविरुद्धम्। अवस्थाविरुद्धं तद् यत् श्रमव्यवायव्यायामसक्तस्यानिलकोपनमाहारं तथा निद्रालसस्यालसस्य भोजनं श्लेष्म कोपनम्। विण्मूत्रमनुत्सृज्य तथा अबुभुक्षितः सन् भुंक्ते अतिक्षुद्वशानुगः भुंक्ते वा तत् सर्वं क्रमविरुद्धम्। परिहारविरुद्धं यथा वाराहादीन्निषेव्य उष्णसेवनं तथा घृतादीन् पीत्वा शीतसेवनम्। दुर्दारुसाधितमपक्कं तण्डुलं, अत्यर्थपक्कं दग्धं वा भुञ्जानस्य तत् सर्वं पाकविरुद्धम्। संयोगविरुद्धं यथा पयसा सह अम्लसेवनम्, यद् हृद्विरुद्धं यत् सञ्जातरसमतिक्रान्तरसं विपन्नरसं वा तत् सर्वं संपद्विरुद्धम्। निभृते, यत् न भुज्यते तद् विधिविरुद्धम्

(चसू. २६.८६-१०१)

कर्मविरुद्धं यथा—कपोतान् सर्षपतैलभृष्टान्नाद्यात्; कपिञ्जलमयूरलावतित्तिरिगोधाश्चैरण्डादार्व्यग्निसिद्धा एरण्डतैलसिद्धा वा नाद्यात् कांस्यभाजने दशरात्रपर्युषितं सर्पिः; मधु चौष्णेरुष्णे वा; मत्स्यपरिपचने शृङ्गवेरपरिपचने वा सिद्धां काकमाचीं; तिलकल्पसिद्धमुपोदिकाशाकं नारिकेलेन वराहवसापरिभृष्टां बलाकां; भासमङ्गारशूल्यं नाश्नीयदिति। मानविरुद्धम्, यथा मध्वम्बुनी मधुसर्पिषी मानतस्तुल्ये नाश्नीयात्; स्नेहौ मधुस्नेहौ जलस्नेहौ वा विशेषादान्तरीक्षोदकानुपानौ।

रसतः वीर्यतः विपाकतश्च विरुद्धानि—तत्र मधुराम्लौ रसवीर्यविरुद्धौ मधुरलवणौ च मधुरकटुकौ च सर्वतः मधुरतिक्तौ रसविपाकाभ्याम् मधुरकषायौ च अम्ललवणौ रसतः अम्लकटुकौ रसविपाकाभ्याम् अम्लतिक्तावम्लकषायौ च सर्वतः लवणकटुकौ रसविपाकाभ्यां लवणतिक्तौ लवणकषायौ च सर्वतः, कटुतिक्तौ रसवीर्याभ्यां कटुकषायौ च, तिक्तकषायौ रसतः (सुसू. २०.८-१६)

विरुद्ध. जे द्रव्य दोषांचा उत्क्लेश करते परंतु दोषांना शरिराबाहेर काढून टाकत नाही ते विरुद्ध द्रव्य. उदा०—सर्व तऱ्हेचे मासे दुधाबरोबर सेवन करू नयेत. विशेषतः चिलिचिम मासा अति अभिष्यंदी असल्याने तो तर मुळीच घेऊ नये. तो अभिष्यंद

विषयक मुख्य मुख्य लक्षणे व व्याधि उत्पन्न करतो व आमविष वाढवितो. ग्राम्य आणि आनूप प्रांतातील प्राण्यांचे मांस व मध, तिळ, गूळ, दूध, उडीद, मुळे, कमळाची बिसे, मोड आलेली धान्ये ही एकत्र मिश्रण करून खाऊ नयेत. त्यामुळे बधिरता अंधत्व, कंप, जाड्य, मुकेपणा, गेंगाणा उच्चार होतो किंवा मरणही येते. पुष्कर किंवा रोहिणीक यांची भाजी किंवा पारवे हे मोहरीच्या तेलात भाजून दूध व मधाबरोबर खाऊ नयेत. त्यामुळे रक्तदोष, कफ दोष, धमन्या फुगणे, अपस्मार, शंखक नावाचा शिरोरोग, गलगंड, रोहिणी यांपैकी कोणता तरी रोग होतो किंवा मृत्यु येतो. मुळा, लसूण, शेवगा, अजवला, मोहरी, तुळस इ० खाऊन वर दूध पिऊ नये. कुष्ठ होण्याचा संभव आहे. जातुकाची भाजी किंवा पिकलेले ओटीचे फळ ही मध दुधाबरोबर योजू नयेत. ह्यामुळे मरण किंवा बल— वर्ण—तेज— वीर्य यांचा क्षय किंवा छोट्याशा व्याधींची सुरुवात किंवा नपुंसकत्व निमाण होते. तेच ओटीचे फळ उडदाचे वरण, गूळ—तूप यांच्या बरोबरही योजू नये. त्यांचाही परस्पर विरोध आहे. त्याचप्रमाणे आंबाडा, आंबा, महाळुंग, ओटीचे फळ, करवंद, केळ, चुका, बोरे, रातांबा, कवठ, जांभूळ, चिंच, पारावत, अक्रोड, फणस, नारळ, डाळिंब, आवळकाठी ही आणि अन्य आंबट द्रव घट्ट द्रव्ये ही दुधाशी संयोगाने विरुद्ध आहेत. राळे, रानमठ, कुळीथ, उडीद, पावटे हेही दुधाशी विरुद्ध आहेत. कुसुंभशाक शार्करेपासून केलेले मैरेय मद्य व मध यांचे बरोबर उपयोगात आणली तर विरुद्ध आहेत, वातवृद्धी करणारी आहेत. हारिद्रक नामक पक्षी मोहरीच्या तेलात भाजून खाल्ला तर विरुद्ध असून कफ वाढवितो. उपोदिका ( घोळ ) तिळाच्या चटणीबरोबर खाल्ली तर अतिसार होतो. बगळीचे मांस मद्यासह कुल्माषाबरोबर घेतले तर विरुद्ध आहे. तेच डुकराच्या चरबीमध्ये भाजून घेतले तर ताबडतोब जीविताचा नाश करते. मोराचे मांस एरंडाच्या काडीला टोचून एरंडाच्या लाकडाच्या विस्तवावर भाजून एरंड तेलाशी खाल्ले तर त्यानेही ताडतोब मृत्यु येतो. हारिद्रक पक्ष्याचे मांस हळदीच्या काडीला टोचून हळदीच्या काड्यांच्या विस्तवावर भाजून खाल्ले तर ताबडतोब मृत्यु येतो. तेच राखेत माखले गेले व मधाशी खाल्ले तर त्वरित मृत्यु येतो. मासे तळलेल्या तेलात पिंपळया, काकमाची किंवा मध यामुळे मृत्यु येतो. मध ऊन करून उष्ण विकारात देणे मृत्यूला कारण होते. मध आणि तूप सारख्या प्रमाणात दिले तर विरुद्ध आहे. मध आणि आंतरिक्ष जल समप्रमाणात, मध आणि पुष्कर बीज, मध पिऊन उष्ण पाणी, बिब्याबरोबर ऊन पाणी, ताकातील कपिला, शिळी काकमाची, भास पक्ष्याचे काडीला टोचून भाजलेले मांस ही स्वभावतःच विरुद्ध आहेत.



जे देश, काल, अग्नि, मात्रा, सवय, वायु इत्यादी दृष्टीने तसेच संस्कार, वीर्य, कोष्ठ, अवस्था क्रमाने, परिहाराने, पाकाने, संयोगाने विरुद्ध तसेच मनाला विरुद्ध; चतुष्पाद् संपत्तीच्या दृष्टीने विरुद्ध, नियमाच्या विरुद्ध; ते सर्वच अहितकर समजावे. ज्याप्रमाणे जांगल देशामध्ये रूक्ष तीक्ष्णादी गुणांचे औषध तसेच आनूप देशात स्निग्ध, शीतादी गुणांचे औषध देणे देशविरुद्ध आहे. शीत कालामध्ये शीत रूक्ष इ० गुणांच्या पदार्थांचे सेवन; उष्ण कालात कटु, उष्ण पदार्थांचे सेवन कालविरुद्ध आहे. मंद, तीक्ष्ण, सम, विषम अशा चारही प्रकारच्या अग्नीच्या विरुद्ध जो आहार विहार तो अग्नीविरुद्ध, समभाग तूप मध मिश्रण हे मात्राविरुद्ध. कटुक, उष्ण मानवणाराना स्वादु—शीत सेवन हे सात्म्यविरुद्ध आहे. समान गुणांच्या अभ्यासाच्या विरुद्ध जी औषध योजना ती वातादी दोषविरुद्ध. जेवण पोटात गेल्यावर जे विषवत् होते ते संस्कारविरुद्ध शीतवीर्य द्रव्य उष्णवीर्य द्रव्याबरोबर घेतले तर ते वीर्यविरुद्ध. क्रूर कोष्ठी माणसाने अत्यंत थोडे मंदवीर्य आणि भेदन न करणारे औषध तसेच मृदु कोष्ठी माणसाला जड मलभेदन करणारे औषध देणे हे कोष्ठविरुद्ध. श्रम-व्यायाम-मैथुन करणाऱ्यांना वात प्रकोपक आहार देणे, तसेच निद्राधिक्याने आळस आलेल्याना कफकारक भोजन देणे हे अवस्थाविरुध्द होते. मलमूत्र विसर्जनानंतर भूक न लागता खाल्ले किंवा मलमूत्रबिसर्जन न होता अति भूक लागून खाल्ले हे दोन्हीही क्रमबिरुद्ध आहे. तसेच वराहादी मांस खाऊन वर उष्णसेवन किंवा घृतादीसेवन करून शीतसेवन हे परिहारविरुद्ध आहे. वाईट किंवा अपुऱ्या जळणावर शिजवलेले कच्चे तांदूळ

किंवा फार शिजलेले वा करपलेले तांदूळ हे पाकविरुद्ध आहे.

दुधाबरोबर आंबट हे संयोगविरुद्ध आहे. जे मनाला आवडत नाही ते हृद्‌विरुद्ध. ज्यात रस परिपोष नाही किंवा रसाचा अतिरेक झाला किंवा जे बिघडले ते संपद्‌विरुद्ध. चित्त स्थिर ठेवून जे सेवन केले जात नाही ते विधिविरुद्ध आहे. **कर्मविरुद्ध**– कपोताचे मांस मोहरीच्या तेलात भाजलेले खाऊ नये. कपिंजल, मोर लाव, तित्तिर, घोरपड यांचे मांस एरंड, दारुहळद यांच्या अग्नीवर एरंड तेलात सिद्ध केलेले खाऊ नये. काशाच्या भांड्यात दहा दिवसपर्यंत ठेवलेले तूप खाऊ नये. मध उन्हाळ्यात वा उष्ण पदार्थाशी, मासे तळलेल्या भांड्यात किंवा आले तळलेल्या किंवा शिजविलेल्या भांड्यात, शिजविलेली काकमाची तिळाच्या चटणीबरोबर, घोळ डुकराच्या चरबीत, भाजलेले बगळीचे मांस नारळाबरोबर, भास पक्ष्याचे मांस सळई टोचून निखाऱ्यावर भाजलेले ही सर्व कर्मविरुद्ध आहेत.

**प्रमाणविरुद्ध**– सम प्रमाणात मध आणि पाणी, मध आणि तूप, दोन स्नेह आणि मध, दोन स्नेह आणि पाणी, विशेषतः आंतरिक्ष उदक ही वरील दोघांशी समभाग सेवन करणे प्रमाणविरुद्ध आहे.

**रस-वीर्य-विपाक दृष्टीने ही विरुद्ध**–मधुर आणि अम्ल ही रस आणि वीर्याने विरुद्ध आहेत. मधुर आणि लवण, मधुर आणि तिखट रसांचे मिश्रण रसवीर्य विपाक सर्वतः. मधुर आणि कडू रस व विपाकाने. मधुर आणि कषाय ही सुद्धा रसविपाकाने विरुद्ध आहेत.

अम्ल आणि लवण रसाने विरुद्ध, अम्ल आणि तिखट रसविपाकाने विरुद्ध, अम्ल आणि कडू व अम्ल आणि कषाय रस वीर्य विपाकाने विरुद्ध आहेत. लवण आणि तिखट रस विपाकाने लवण आणि कडू व लवण आणि तुरट ही रस-वीर्य-विपाकाने विरुद्ध तिखट आणि कडू रस व वीर्याने विरुद्ध. तिखट आणि कषाय हे रस वीर्याने विरुद्ध. कडू आणि कषाय रसाने विरुद्ध आहेत.

**–गुणसंनिपात**–पु., **विरुद्धगुणयोः मेलकः** (चवि. १.१४) दोन विरुद्ध गुणांचे एकत्रीकरण.

**–योनि**–वि., **परस्परविरुद्धो धर्मो यस्य यद्वा परस्परविरुद्धं कर्म यस्य वा** ( चइ. ६.२२ ) परस्परविरुद्ध कार्य करणारे. परस्पर विरुद्ध गुणधर्म किंवा कार्य असणारे द्रव्य.

**विरुद्धान्न**–न.,विरुद्धाहारः, द्र०'विरुद्धम्'(असंसू.२७.६) विरुद्ध आहार.

**विरुद्धाभ्यवहार**–पु., **विरुद्धाहारः** ( अहसू. १८.६ ) विरुद्ध आहार.

**विरुद्धाशन**–न., **विरुद्धाहारः** ( अहसू. ८.१३ ) विरुद्ध आहार.

**विरुद्धाशनजरोग**–पु., **विरुद्धाख्येन अन्नेन यः व्याधिः उत्पद्यते सः । यथा–षाण्ढ्यान्ध्यवीसर्पदकोदर–विस्फोटकोन्मादभगन्दरमूर्च्छामदाध्मानगलग्रह–पाण्ड्वामयामविषकिलासकुष्ठग्रहणीगदशोथाम्ल-पित्तज्वरपीनससन्तानदोषा मृत्युश्च** ( चसू. २६.१०२-१०३ ) **एतेषां व्याधीनां प्रतिकारार्थं वमनं, विरेचनं व्याधिविरोधिद्रव्यैः संशमनं तथाविधैश्च द्रव्यैः पूर्वमभिसंस्कारः शरीरस्य** ( चसू. २६.१०२-१०६ )
विरुद्ध अन्नाने उत्पन्न होणारे रोग. जसे नपुंसकत्व, आंधळेपण, वीसर्प, जलोदर, विस्फोट, उन्माद, भगन्दर, मूर्च्छा, मद, पोट फुगणे, गलग्रह, पांडुरोग, आमविष, क्लिासकुष्ठ, ग्रहणी, सूज, अम्लपित्त, ज्वर, पीनस, संतती होऊन मरणे आणि मृत्यु. वमन विरेचन व्याधिप्रतिकारक औषधांनी त्या रोगांचे शमन करावे. अशी विरोधी द्रव्ये क्रमश सेवन करून आत्मसात करावी.

**विरुद्धाहार**–पु., **विरुद्धः आहारः द्र० 'विरुद्ध'** (सुचि. २३.४)
विरुद्ध आहार.

**विरुद्धोपक्रम**–वि., **विरुद्धः उपक्रमः यस्य यस्मिन्वा सः** (चसू. २८.७; सुसू. ४५.१४७ )
परस्परविरुद्ध चिकित्सा.

**विरूक्षण**–वि., **विशेषेण रूक्षणम्, विशेषरूक्षत्वकरम्** ( **द्रव्यम्** ) ( चसू. ५.४० )
विशेष प्रकारची रूक्षता निर्माण करणारे ( द्रव्य )

**विरूढ**–वि., **अंकुरितम्** (चसू. १८.६) मोड आलेले धान्य.

**–धाना**–स्त्री., **अंकुरितस्य यवस्य धाना** (चसू. २७.२६७)
मोड आलेल्या जवाच्या लाह्या.

**–धान्य**–न., **अंकुराः उत्पन्नाः यस्मिन् धान्ये, तत् उत्पन्नाङ्कुरं धान्यम्** ( चसू. २६.८४ )
मोड आलेले धान्य,

**विरूढक**-न., अंकुरितधान्यम् ( चसू. ४६.३८१-३८२ )
मोड आलेले धान्य.

**विरूप**-वि., विकृताकारं विकृतरूपं वा ( चसू. २८.१८ )
कुरूप, विकृतरूप.
वनस्पति० पिप्पलीमूलम् ( रा. ६.११३ )
पिंपळमूळ.

**(·विरूपा )**-स्त्री., वनस्पति० धन्वयासः ( रा. ३.२० )
धमासा.
वनस्पति० अतिविषा ( ध. १.११ ) अतिविष.

**विरेक**-पु., गुदमार्गेणान्तःस्थितस्य दोषस्य निःसारणम् ( अहृसू. १.२६ )
गुदमार्गाने शरिरातील दोषांचे निःसरण.
अत्र दोषमलरेचनात् विरेचनं वमनं च ( ड. सुचि. ३४.२२ )
मलरूप दोषांच्या रेचनासाठी म्हणजे त्यांना बाहेर घालवण्यासाठी विरेचन किंवा वमन देणे.
मूर्च्छनाख्यः पारदसंस्कार० ( र. ११.३३ )
मूर्च्छन नावाचा पाऱ्यावर करावयाचा संस्कार.

**विरेचन**-न., उपक्रम० पित्तहराणां श्रेष्ठम् (चसू.२५.४०)
स च अधोभागेन गुदेन दोषनिर्हरणं करोति (चक. १.४) वमनं विरेचनं च शरीरमलविरेचनाद्विरेचनसंज्ञां लभते (चक. १.४) एतत् पच्यमानदोषनिर्हरणार्थमुपयुज्यते ( चक. १२.६५ ) तस्यौपाधिकभेदाः चतुर्विधाः, तद् यथा–अनुलोमनम्–यन्मलानां पाकं कृत्वा बन्धं च भित्वाऽधो नयति तदनुलोमनं ज्ञेयम्; यथा हरीतकी। स्रंसनम्–यत् कोष्ठे श्लिष्टं पक्तव्यं मलादिकमपक्त्वैवाधो नयति, तत् स्रंसनं ज्ञेयं; यथा कृतमालकः
भेदनम्–यदबद्धं मलादिकं बद्धं वा, मलैः पिण्डितं वा भित्वाऽधः पातयति, तद् भेदनं ज्ञेयं; यथा कटुकी
रेचनम्–यद् विपक्वमपक्वं वा मलादि द्रवतां नयेत् रेचयत्यपि,तद् रेचनं; यथा त्रिवृता(शार्ङ्ग. पूर्वखण्ड)
विरेचनप्रक्रिया–तत्रोष्णतीक्ष्णसूक्ष्मव्यवायिविकाशीन्यौषधानि स्ववीर्येण हृदयमुपेत्य धमनीरनुसृत्य स्थूलाणुस्रोतोभ्यः केवलं शरीरगतं दोषसंघातमाग्नेयत्वाद्विष्यन्दयति, तैक्ष्ण्यात् विच्छिन्दति, स विच्छिन्नो दोषः परिप्लवन् स्नेहभाविते काये स्नेहाक्तभाजनस्थमिव क्षौद्रमसज्जन्नणुप्रवणभावादामाशयमागम्य सलिलपृथिव्यात्मकत्वादधोभागप्रभावाच्चौषधस्याधः प्रवर्तते ( चक. १.५ )
विरेचनयोग्याः–कुष्ठज्वरमेहोर्ध्वरक्तपित्तभगन्दरोदरार्शोब्रध्नप्लीहगुल्मार्बुदगलगण्डग्रन्थिविसूचिकालसकमूत्राघातक्रिमिकोष्ठविसर्पपाण्डुरोगशिरःपार्श्वशूलोदावर्तनेत्रास्यदाहहृद्रोगव्यङ्गनीलिकानेत्रनासिकास्यस्रवणहलीमकश्वासकासकामलाऽपच्यपस्मारोन्मादवातरक्तयोनिरेतोदोषतैमिर्यारोचकाविपाकच्छर्दिश्वयथूदरविस्फोटकादयः पित्तव्याधयो विशेषेण महारोगाध्यायोक्ताश्च; एतेषु हि विरेचनं प्रधानतममित्युक्तम् ( चसि. २.१३ ) सुश्रुते–गरविद्रधिवृद्धिव्रणाक्षिपाककाचतिमिराऽभिष्यन्दाश्च(सुचि.३३.३२)
विरेचनायोग्याः– सुभगक्षतगुदमुक्तनालाधोभागरक्तपित्तविलङ्घितदुर्बलेन्द्रियाल्पाग्निनिरूढकामादिव्यग्राजीर्णिनवज्वरिमदात्ययिताध्मातशल्यार्दिताभिहतातिस्निग्धरूक्षदारुणकोष्ठाः क्षतादयो गर्भिण्यश्च ( चसि. २.११ ) विरेचनविधिः–आतुरं पूर्वाह्णे लघु भोजयेत्, फलाम्लमुष्णोदकं चैनमनुपाययेत्। अथापरेऽह्नि विगतश्लेष्मधातुमातुरोपक्रमणीयादवेक्ष्यातुरमथास्मै औषधमात्रां पातुं प्रयच्छेत्। तत्र मृदुः, क्रूरो, मध्यम इति त्रिविधः कोष्ठो भवति, तत्र मृदौ मात्रा मृद्वी, तीक्ष्णा क्रूरे, मध्ये मध्या कर्तव्येति। पीतौषधश्च तन्मनाः शय्याभ्याशे विरेच्यते (सुचि. ३३.२०-२१)
विरेचने मूत्रपुरीषपित्तौषधकफाः क्रमेण गच्छन्ति ( सुचि. ३३.२३ ) विरेचनं पीतवाँस्तु बुधः वेगान् न धारयेत्। निवातशायी शीताम्बु न स्पृशेत् न प्रवाहयेत् च ( सुचि. ३३.२२ ) विरेचने दश वेगाः जघन्यमानम् विंशति वेगाः मध्यममानम्, त्रिंशद्वेगाः प्रवरमानमिति बोद्धव्यम्। तथैव वमनाद्द्विगुणप्रस्थो जघन्ये विरेचने, त्रिगुणः मध्यमे, चतुर्गुणश्च प्रवरे इष्टः अन्यच्च कफान्तत्वं विरेकस्येष्टम्। विरेके सविड्कान् द्वित्रान् वेगानपनीय शेषं मेयम् ( चसि. १.१३. चक्र. ) सम्यग्योगलक्षणानि–दौर्बल्यं, लाघवं, ग्लानिर्व्याधीनामणुता, रुचिप्रादुर्भावः, हृद्वर्णशुद्धिः क्षुत्तृष्णा, काले वेगप्रवर्तनं बुद्धीन्द्रियमनःशुद्धिः मारुतानुलोमता कायाग्नेश्चानुवर्तनम् (चसू. १६.५-६; चसि.१.१७)
हीनयोगलक्षणानि–ष्ठीवनं, हृदयाशुद्धिः, श्लेष्मपित्तयोः, उत्क्लेशः, आध्मानम् अरुचिः, छर्दिः

अदौर्बल्यम्, अलाघवम्, जङ्घोरुसादः तन्द्रा स्तैमित्यं पीनसागमः मारुतनिग्रहश्च। ( चसू. १६.७-८; चसि. १.१८ ) विरेचनात् प्रवृत्तौ प्रवर्तनोपायः–अप्रवृत्तौ तु उष्णाम्बु पाययेत् पाणितापेन च उदरं स्वेदयेत् प्रवर्तने अल्पे सति तस्मिन् दिने भुक्त्वा द्वितीयदिने पुनर्विरेचनं पिबेत् यस्तु निवृत्तस्नेहवान्न विरेच्यते, स पुनः स्निग्धस्विन्नो दशदिनेभ्यः ऊर्ध्वं विरेचनं पिबेत् ( अहसू. १८.३५-३७ )

अतियोगलक्षणानि–विट्पित्तकफवातानां यथाक्रममागमनात् परं ( चसू. १६.९ ) सचन्द्रकं सलिलमधःस्रवति ततो मांसधावनप्रकाशमुत्तरकालं जीवशोणितं च ततो गुदःनिस्सरणं वेपथुर्वमनातियोगोपद्रवाश्चास्य भवन्ति ( सुचि. ३४.१३ ) ऊर्ध्वगाः वातरोगाश्च वाग्ग्रहश्चास्य भवति ( चसू. १६.११ ) अतियोगचिकित्सा–तं निःस्रुतशोणितविधानेनोपचरेत्, निःसर्पितगुदस्य गुदमभ्यज्य परिस्वेद्यान्तः पीडयेत्। वेपथौ वातव्याधिविधानं कुर्वीत, जिव्हानिःसरणादिषूक्तः प्रतिकारः, अतिप्रवृत्ते वा जीवशोणिते काश्मरीफलबदरीदूर्वोशीरैः शृतेन पयसा घृतमण्डाञ्जनयुक्तेन सुशीतेनास्थापयेत् न्यग्रोधादिकषायेक्षुरसघृतशोणितसंसृष्टैश्चैनं बस्तिभिरुपाचरेत् शोणितष्ठीवने रक्तपित्तरक्तातीसारक्रियाश्चास्य विदध्यात्। न्यग्रोधादिं चास्य विदध्यात् पानभोजनेषु ( सुचि. ३४.१३ ) विरेचनान्तरं पेयादिक-क्रमः–प्रधानमध्यावरशुद्धिशुद्धो नरः क्रमेण यथासंख्यं पेयां त्रीनन्नकालान् द्वावन्नकालावेकमन्नकालं भजेत्। यथा प्रधानशुद्ध्या शुद्धो नरो द्वावन्नकालावेकस्मिन् दिने पेयां भजेत्। द्वितीयेऽह्न्येकमन्नकालं पेयां द्वितीयमन्नकालं विलेपीम्। तृतीये वासरे द्वावन्नकालौ विलेपीमेव चतुर्थे अकृतं यूषं, कृतं यूषं च द्वावन्नकालौ भजेत्। पञ्चमेऽह्नि प्रथमेऽन्नकाले च। त्रिष्वपि कालेष्वकृतं कृतं च यूषं भजेत्। एवं कालत्रयं कृताकृतं रसं विभज्य भोजयेत्। सप्तरात्रेण प्रकृतिभोजनं क्रमेण सेवेत (अहसू. १८.२९) विरेचनप्रशस्तिः–सम्यगुपास्यमानं विरेचनं बुद्धेः प्रसादम् इंद्रियाणां बलं धातुस्थिरत्वम् अग्निदीप्तिं चिराच्च वयसः पाकं करोति ( सुचि. ३३.२७ )

विरेचन हा एक चिकित्सेतील प्रकार आहे. पित्त शरिराबाहेर काढण्याचा चिकित्साप्रकारातील श्रेष्ठ उपचार आहे. तो अधोभागातून गुदमार्गाने दोषांचे निर्हरण करतो. वमन आणि विरेचन ही शरिरातील मल शरिराबाहेर टाकतात म्हणून विरेचन-संज्ञा दोघानाही असली तरी सुद्धा गुदमार्गाने जे पच्यमान दोषांना शरिराबाहेर घालविते तेच विरेचन. त्याचे चार प्रकार आहेत. ( १ ) अनुलोमन जे मलांचे पचन करून बंध फोडून मलाला गुदावाटे शरीराबाहेर काढते ते अनुलोमन. उदा० हिरडा. (२) स्रंसन जे कोष्ठामध्ये चिकटलेल्या मलाला पचवून अथवा पचनास योग्य अवस्थेतील मलादींना अपक्व अवस्थेतही गुदमार्गाने शरिराबाहेर काढते ते स्रंसन उदा० बाहवा.

(३) भेदन–दोषांच्या योगाने अबद्ध बध्द किंवा पिंडित झालेल्या मलादींना फोडून जे अधोमार्गाने खाली पाडते ते भेदन. उदा० कुटकी.

(४) रेचन–जे पक्व किंवा अपक्व मलाला पातळपणा आणून द्रवमल प्रवर्तन करते ते रेचन होय. उदा० निशोत्तर, नळीचे तेड.

**विरेचन प्रक्रिया**— विरेचन कार्य करणारी उष्ण, तीक्ष्ण, सूक्ष्म, व्यवायि, विकाशी गुणांची औषधे स्ववीर्याने हृदयाकडे जाऊन सर्व धमन्यांमध्ये प्रवेश करून लहान मोठ्या स्रोतसांपासून केवळ शरीरगत दोषांच्या जमावाला अग्निगुणाने पातळ करतात, तीक्ष्ण गुणामुळे छेदन करतात तो विच्छिन्न दोष पसरत असता तेला तुपानी राबलेल्या भांड्यात मध असावे व ते चिकटू नये तसे स्नेहयुक्त शरिरात कणाकणाच्या स्वरूपामुळे आमाशयात येऊन औषधाच्या ठिकाणी असलेल्या आप व पृथ्वी गुणांच्या प्रभावामुळे खाली जाण्याच्या स्वभावानुसार खाली प्रवृत्त होतो.

**विरेचनाला योग्य**— कुष्ठ, ज्वर, मेह, ऊर्ध्व-रक्तपित्त, भगंदर, उदर, मूळव्याध, ब्रध्न, प्लीहा, गुल्म, अर्बुद, गलगंड, ग्रंथी, विसूचिका, अलसक, मूत्राघात, क्रिमिकोष्ठ, विसर्प, पांडुरोग, शिरःशूल, पार्श्वशूल, उदावर्त, डोळ्याचे तोंडाचे दाहविषयक व हृदयाचे रोग, वांग, नीलिका, डोळे–नाक–तोंडातून स्राव, हलीमक, श्वास, खोकला, कावीळ, अपची, अपस्मार, उन्माद, वातरक्त, योनिरोग, शुक्रदोष, तिमिर,

अरोचक, अपचन, वांती, सूज, उदर, विस्फोट, इत्यादी, पित्तविकार विशेषतः महारोगाध्यायात सांगितलेले आणखी इतर विकार या सर्वांना विरेचन हेच मुख्य औषध आहे असे शास्त्रमत आहे. सुश्रुतमताने कृत्रिम विष, गळू, आंत्रवृद्धि, व्रणरोग, अक्षिपाक, काचबिंदू, तिमिर रोग व अभिष्यंद ह्या विकारांचाही यात अंतर्भाव होतो.

**विरेचनाला अयोग्य**— गुद किंवा योनिमार्गात क्षत असणारा, गुदभ्रंश, गुदद्वार मिटत नसलेला, अधोगामी रक्तपित्ती, लंघन दिलेला, दुर्बळ, दुर्बलेंद्रियी, अग्निमांद्य असलेला, निरूह बस्ति दिलेला, कामक्रोधादी विकारग्रस्त, अजीर्णी, नवज्वरी, मदात्ययी, पोट फुगलेला, शल्यपीडित, आघात झालेला, अतिस्निग्ध–अतिरूक्ष–अतिक्रूर कोठा असलेला, उरःक्षत झालेला आणि गर्भिणी स्त्रीला विरेचन देऊ नये.

**विरेचन विधि**— रोग्याला विरेचन देण्याच्या दिवसाच्या आदल्या दिवशी हलके जेवण द्यावे. अम्लफलरस व गरम पाणी प्यावयास द्यावे. दुसऱ्या दिवशी कफदोष गेल्यावर आतुरोपक्रमणीय अध्यायात सांगितल्याप्रमाणे रोग्याला योग्य प्रमाणात विरेचनाचे औषध पाजावे. मृदु, क्रूर, व मध्यम असा कोठा तीन प्रकारचा असतो. त्यात मृदु कोष्ठीला मृदु मात्रा, क्रूर कोष्ठीला तीक्ष्ण मात्रा मध्यम कोष्ठीला मध्यम मात्रा द्यावी. नंतर त्यास औषध पाजल्यावर विरेचनाच्या वेगाकडे लक्ष ठेवून अंथरुणाजवळच विरेचन करवावे. विरेचन होत असता मूत्र, विष्ठा, पित्त, औषध, आणि कफ असे क्रमाने बाहेर येतात. विरेचन घेतलेल्यांनी वेग अडवून ठेवू नये, निर्वात जागी झोपावे, गार पाण्याला स्पर्श करू नये, कुंथू नये. विरेचनामध्ये दहा वेग हे अगदी कमी प्रमाण. वीस वेग हे मध्यम प्रमाण. तीस वेग हे अधिकात अधिक प्रमाण जाणावे. हे वेग मळासह पहिले दोन तीन वेग सोडून मग मोजावे. १३॥ पळे = ५४ तोळे = १ प्रस्थ ह्या हिशेबाने वमनापेक्षा विरेचनाचे दुप्पट प्रमाण हे कनिष्ठ. तिप्पट प्रमाण मध्यम आणि चौपट उत्तम मानले आहे.

**योग्य विरेचन झाल्याची चिन्हे**—दुर्बलता, शरिराला हलकेपणा, ग्लानि, व्याधीचा जोर कमी होणे, रुचि उत्पन्न होणे, हृदय व वर्णशुद्धि, भूक-तहान ही योग्य काली उत्पन्न होणे, बुद्धि–इंद्रिये यांची शुद्धि होणे, वायूची अनुलोमता व शरीरोष्मा मूळ प्रकृतीइतका होणे ही योग्य विरेचनाची चिन्हे आहेत. **हीनयोग चिन्हे**—तोंडाला थुंकी सुटणे, हृदय अशुद्ध वाटणे, कफ आणि पित्त यांचा उत्क्लेश होणे, पोट फुगणे, अरुचि, ओकारी, बल कमी न होणे, हलकेपणा न वाटणे, पोटऱ्या व मांड्या गळणे, झांपड येणे, ओल्या वस्त्राने शरीर गुंडाळल्यासारखे वाटणे, पडसे येणे, वायूचा अवरोध होणे. **विरेचन लागू न पडल्यास करावयाचे उपाय**—गरम पाणी प्यावयास द्यावे, हाताने पोट शेकावे, जर त्या दिवशी थोडे विरेचन झाले तर त्या दिवशी जेवण करून दुसऱ्या दिवशी पुनः विरेचन द्यावे. मात्र ज्याचा स्नेह पडला परंतु विरेचन झाले नाही तर त्याला परत स्नेहस्वेद देऊन विरेचन द्यावे.

**अतियोगाची लक्षणे**— मळाबरोबर पित्त कफ पडून गेल्यानंतर तेलकट चंद्रिकायुक्त पाणी अधोमार्गाने पडत राहणे, नंतर मांस धुतल्यासारखे पाणी पडते, नंतर जीवनाधार रक्ताचा स्राव होणे, गुदच बाहेर येणे, कापरे सुटणे, ऊर्ध्वगवातरोग, वाचा बसणे तसेच वमनाचा अतियोग होऊन जे उपद्रव होतात ती सर्व लक्षणे होतात.

**अतियोगावरील चिकित्सा**— रक्तस्रावावरील उपचार करावे. गुदभ्रंश झाला असेल तर त्याला तेल लावून शेकून परत स्वस्थानी बसवावे. कापरे वगैरे विकारावर चिकित्सा करावी. जीभ बाहेर येणे वगैरे उपद्रवावर सांगितलेला उपचार करावा. जीव शोणित अतिस्रावत असेल तर शिवणीचे फळ, दूर्वा, वाळा, यांनी सिद्ध केलेल्या दुधाशी तुपाचा स्वच्छ द्रव, रसांजन या द्रव्यांच्या सहाय्याने थंड आस्थापनबस्ती द्यावा. आणि न्यग्रोधादी क्षीरीवृक्षांच्या कषायामध्ये उसाचा रस, घृत व रक्त घालून बस्ती द्यावा. थुंकीत रक्त येत असता रक्तपित्ताची किंवा रक्तातीसाराची चिकित्सा करावी. खानपानासाठी ही न्यग्रोधादि कषायपान व त्यातच केलेली पेया, यूष इत्यादी द्यावे. **विरेचनानंतर आहार**—विरेचन देऊन झाल्यावर प्रधान, मध्यम, सामान्य या अवस्थानुरूप तीन अन्नकाल, दोन अन्नकाल,

एक अन्नकाल पेयादिक्रम आचरावा. नंतर उत्कृष्ट शोधन झालेल्या पुरुषाला एके दिवशी दोन अन्नकाली, दुसरे दिवशी एक अन्नकाली पेया द्यावी; व दुसऱ्या अन्नकाली विलेपी द्यावी. तिसऱ्या दिवशी दोन्ही अन्नकाली विलेपीच द्यावी. चवथ्या दिवशी अकृत यूष, कृत यूष दोन अन्नकाली द्यावा. पाचव्या दिवशी सुद्धा पहिल्या अन्नकाली व नंतरच्या तिन्ही अन्नकाली अकृत कृत यूष द्यावा. याप्रमाणेच तीन वेळा कृताकृत मांसरस योजना पूर्वक द्यावा. व सात दिवसांनी क्रमशः नेहमीचे जेवण द्यावे. **विरेचनाची प्रशंसा—** बुद्धि निर्मळ होते, इंद्रियांना बल येते, सप्तधातु स्थिर होतात, जठराग्नि प्रदीप्त होतो आणि वृद्धावस्था लौकर येत नाही

**वनस्पति॰ पृथुशिम्बः** ( रा. ९.१४३ )
टेंटूचा भेद. सोनपाठा.

**-द्रव्यविकल्पविज्ञानीय**-वि., अध्यायसंज्ञा॰ ( सुसू. ४४.१ )
या नावाचा अध्याय. यात रेचक द्रव्यांचे निरनिराळे कल्प दिले आहेत.

**-फल**-न., वनस्पति॰ पीलुः ( ध. ५.५१ ) पीलु.

**-व्यापद्**-स्त्री., विरेचनप्रमादजन्या व्याधयः यथा- सावशेषौषधत्वम् जीर्णौषधत्वम् हीनदोषापहृतत्वम्, वातशूलं, अयोगोऽतियोगो, जीवादानम्, आध्मानं, परिकर्तिका, परिस्रावः, प्रवाहिका, हृदयोपसरणम्, विबन्धः, अंगपरिग्रहश्च (सुचि. ३४.३) **सावशेषौषधस्य लक्षणानि**- तृष्णा, पार्श्वशूलं, च्छर्दिर्मूर्च्छा, पर्वभेदो, हृल्लासोऽरतिरुद्गाराविशुद्धिश्च ( सुचि. ३४.६ ) तेषां **चिकित्सा**- तत्र अधोभागिके विरेचनद्रव्यविषये यः सावशेषौषधोऽतिप्रधावितदोषस्तमसम्यग्विरिक्तमप्यतिप्रधावितदोषत्वहेतुना वामयेत् परमतिबलं पुरुषम् ( सुचि. ३४.६ ) **जीर्णौषधत्वे लक्षणानि**-व्याधिविभ्रमो बल-विभ्रंशश्च । **चिकित्सा**- तम् अनल्पममन्दमौषधं च पाययेत् । **हीनदोषापहृतत्वे लक्षणानि**- गुदपरिकर्तनमाध्मानं शिरोगौरवमनिःसरणं वा वायोः, व्याधिवृद्धिश्च **चिकित्सा**- तमुपपाद्य भूयः स्नेहस्वेदाभ्यां विरेचयेद्दृढतरं, दृढं बहुप्रचलितदोषं वा तृतीये दिवसेऽल्पगुणं चेति । **वातशूले लक्षणानि**-प्रकुपितवायुः पार्श्वपृष्ठश्रोणिमन्यामर्मशूलं मूर्च्छां भ्रमं मदं संज्ञानाशं च करोति । **चिकित्सा**-तमभ्यज्य धान्यस्वेदेन स्वेदयित्वा यष्टीमधुकविपक्वेन तैलेनानुवासयेत् । **अयोगातियोगलक्षणानि**-विरेचने द्रष्टव्यम् आध्माने अनिलमूत्रपुरीषसंगः समुन्नद्धोदरता पार्श्वभङ्गो गुदबस्तिनिस्तोदनं भक्तारुचिश्च भवति । **चिकित्सा**- तमुपस्वेद्यानाहवर्तिदीपनबस्तिक्रियाभिरुपचरेत् । **परिकर्तिकायां लक्षणानि**-गुदनाभिमेढ्रबस्तिशिरस्सु सदाहं परिकर्तनमनिलसङ्गो वायुविष्टम्भो भक्तारुचिश्च भवति । **चिकित्सा** तत्र पिच्छाबस्तिर्यष्टीमधुककृष्णतिलकल्कमधुघृतयुक्तः, शीताम्बुपरिषिक्तं चैन पयसा भुक्तवन्तं घृतमण्डेन यष्टीमधुकसिद्धेन तैलेनं वाऽनुवासयेत् । **परिस्रावे लक्षणानि**-दौर्बल्योदरविष्टम्भारुचिगात्रसदनानि भवन्ति, सवेदनौ चास्य पित्तश्लेष्माणौ परिस्रवतः । **चिकित्सा**-तमजकर्णधवतिनिशपलाशबलाकषायैर्मधुसंयुक्तैरास्थापयेत् उपशान्तदोषं स्निग्धं च भूयः संशोधयेत् **प्रवाहिकायां लक्षणानि**— तत्र सवातं सदाहं सशूलं गुरु पिच्छिलं श्वेतं कृष्णं सरक्तं वा भृशं प्रवाहमाणकफमुपविशति ।
**चिकित्सा**— तां परिस्रावविधानेनोपचरेत् ।
**हृदयोपसरणे लक्षणानि**— प्रधानमर्मसन्तापाद्वेदनाभिरत्यर्थं पीड्यमानो दन्तान् किटकिटायते उद्वृताक्षो जिह्वां खादति प्रताम्यत्यचेताश्च भवति । **चिकित्सा**-तं परिवर्जयन्ति मूर्खाः, तमभ्यज्य धान्यस्वेदेन स्वेदयेत्, यष्टिमधुकसिद्धेन च तैलेनानुवासयेत्, शिरोविरेचनं चास्मै तीक्ष्णं विदध्यात्, ततो यष्टिमधुकमिश्रेण तण्डुलाम्बुना च्छर्दयेत्, यथादोषोच्छ्रयं चैनं बस्तिभिरुपाचरेत् ।
**विबन्धे लक्षणानि**-वातमूत्रशकृद्ग्रहः आटोपः दाहो ज्वरो वेदनाश्च तीव्रा भवन्ति । **चिकित्सा**- तमाशु वामयित्वा प्राप्तकालां क्रियां कुर्वीत । अधोभागे त्वधोभागदोषहरद्रव्यं सैन्धवाम्लमूत्रसंसृष्टं विरेचनार्थे पाययेत् । आस्थापनमनुवासनं च यथादोषं विदध्यात् । यथादोषमाहारक्रमं च प्रयुञ्जीत ( सुचि. ३४.६-२० )
विरेचन देण्यात घेण्यात घडलेल्या दोषांमुळे होणारे रोग. पोटांत औषध शिल्लक राहाणे, औषधच पचून जाणे. आवश्यकतेपेक्षा दोष कमी निघून जाणे; वातशूल, विरेचन लागू न पडणे, फार लागू होणे,

जीवरक्त विशुद्ध रक्त स्राव होणे, पोट फुगणे, गुदामध्ये पीडा, गुदातून जोरदार स्राव, आवरक्त, हृदयात धडधड, अवरोध, अंग गळणे इत्यादी. त्यांची चिकित्साः—बलवान रोग्याच्या पोटात विरेचनासाठी दिलेले औषध जर शिल्लक राहिले असेल तर अतिबलवान रोग्याला ओकारीचे औषध देऊन ते ओकून टाकवावे. **पोटांत औषध शिल्लक असल्यास**—तहान, फासळ्यात शूल, ओकारी, बेशुद्धि, पेरी दुखणे, लाळ सुटणे बेचैनी आणि ढेकर शुद्ध न येणे. **औषध पचले** तर– कोठ्याचा क्षोभ व बलनाश होतो. यावर पचून गेले असताना तीव्र व पुष्कळ औषध पाजावे. **दोष कमी गेले तर**—गुदात कातरल्यासारखी वेदना, पोटफुगी, डोके जड, वायू न सरणे, अवरोध होणे, व रोग वाढणे ही चिन्हे होतात. **उपचार**—दोषस्राव कमी झाला तर शरिराला स्नेह स्वेद करून दृढ दृढतर बरेच वाढलेले चाळवलेले दोष रेचक देऊन ३ ऱ्या दिवशी काढून टाकावेत. **वातशूलाची लक्षणे**—प्रकुपित वायू; फासळ्या, पाठ, कंबर, ओटीपोट, मान, मर्मस्थाने यात शूल, करतो. बेशुद्धी भ्रम; धुंदी; संज्ञा नाहीशी होणे ही होतात. **वातशूलामध्ये**— स्नेहन देऊन धान्य शिजवून त्याचा स्वेद देऊन ज्येष्ठमध सिद्ध तेलाने अनुवासनबस्ति द्यावा. **रेचक लागू पडले नाही किंवा फार लागू पडले तर**–विरेचन प्रकरणात लक्षणे पहावीत. **पोट फुगले तर**–वात मूत्र व मल यांचा संचय, पोट वर व उंच होणे, फासळ्यात फूट, गुद व ओटी पोटात टोचणी, भोजनाची रुचि न लागणे ही चिन्हे होतात. अशा वेळी रुग्णाला शेकावे, आनाहनाशक वात गुदात घालावी. दीपक औषधे व बस्तिक्रिया करावी. **गुदात मुरडा झाल्याची लक्षणे**–गुद, बेंबी, शिश्न ओटीपोटाचा वरचा भाग यात आगयुक्त कातरल्यासारखी पीडा ( मुरडा ) वाताचा संचय व अवरोध आणि अन्नाची चव नसणे ही होतात. त्यावर पिच्छाबस्ति ज्येष्ठमध, काळेतिळांचा कल्क, मध व घृत घालून द्यावा. थंड पाणी शिंपडून दुधाशी आहार देऊन तुपाच्या निवळीने किंवा ज्येष्ठमध सिद्ध तेलाने अनुवासन द्यावे. **स्रावाची लक्षणे**– दुर्बलता, पोट ताठणे, चव नसणे, अंग गळणे, या बरोबर वेदना युक्त कफ पित्तांचा स्राव होतो. स्राव फार होत असेल तेव्हा असाणा, तिळस, पळस, चिकणा यांचा काढा मध घालून आस्थापन बस्ती द्यावा. व परत स्नेहविधी करून शोधन द्यावे. **आवरक्त लक्षणे**– वातयुक्त, दाहयुक्त, शूलयुक्त, जड, बुळबुळीत, पांढरा काळा रक्तयुक्त मळ किंवा खूप कुंथून कफ गुदमार्गाने पडतो. यावर परिस्रावासाठी जी चिकित्सा आहे त्याप्रमाणेच उपचार करावेत.

**हृदयोपसरणामध्ये**—हृदयात संताप झाल्याने वेदनानी अतिशय पीडा होते, दात कटकट खातो, डोळे वर करून जीभ चावतो, ज्ञान विपरीत होते व मूर्च्छा येते तेव्हा सर्वांगाला अभ्यंग करावा. धान्य शिजवून त्याने शेकावे. ज्येष्ठमध सिद्ध तेलाने अनुवासन द्यावे, तीक्ष्ण शिरोविरेचन द्यावे. नंतर ज्येष्ठमध मिश्र तांदुळाच्या पाण्याने ओकारी करवावी. योग्य त्या दोषाप्रमाणे बस्ती द्यावेत. **वर अवरोध असेल तर**—वात, मूत्र, मल यांचा अवरोध, गुरगुर दाह, ज्वर व तीव्र वेदना होतात, त्याला ताबडतोब ओकारी करवावी. **बेंबीच्या खालील भागात अवरोध असेल तर**—विरेचक द्रव्ये, सैंधव, आंबट द्रव्ये व मूत्र यात मिसळून द्यावीत. **मूत्र अडले तर**—मूत्रविरेचनासाठी औषध पाजावे. आस्थापन अनुवासनही दोषाप्रमाणे द्यावीत. दोषाना अनुसरून आहार द्यावा.

**–साध्य**–वि., **विरेचनेन साध्यः** ( असंसू. २७.९ ) विरेचनाने बरे होणारा.

**–हृतानाह**–वि., **विरेचनेन हृत आनाहो यस्य सः** ( चइ. ९.१० )
विरेचनामुळे पोटाची फुगवटी कमी झालेला.

**विरेचनाश्रय**–पु., **विरेचनाधिकरणम्, क्षीरमूलत्वक्पत्रपुष्पफलादि** ( चसू. ४.५ )
विरेचन ज्यांचे साह्याने केले जाते ती द्रव्ये. निरनिराळ्या झाडांचे चीक, मुळे, साली, पाने, फुले, फळे, इ०.

**विरेचनीय**–(परिव०) वि., **विरेचनार्थं योग्यः** ( सुचि. ३३.२९-३० ) विरेचन देण्यास योग्य.

**विरेचनोपग**–वि., **विरेचन-क्रियाया सहायत्वेनोपगच्छति इति तद् यथा–द्राक्षाकाश्मर्यपरूषका–**

भयामलकबिभीतककुवलबदरकर्कन्धुपीलूनीति ( चसू. ४.१३ )
विरेचन क्रियेला मदत करणारी द्रव्ये. उदा० द्राक्षे, शिवण, फालसा, हिरडा, आवळकटी, बेहडा, कुवल बदर, कर्कंधुजातींची लहान मोठी बोरे, पीलु.

**विरेचनोपयोगिन्**–वि., **विरेचने उपयुज्यमानानि ( द्रव्याणि ) तानि यथा त्रिवृत्-श्यामादन्ती-द्रवन्ती-शङ्खिनी-सप्तलाऽजगन्धाऽजशृङ्गीवचागवाक्षीछगलान्त्रीसुवर्णक्षी-रीचित्रककिणिहीहृस्वपञ्चमूलवृश्चीरपुनर्नवावास्तुकशाकसालमूलानि तिल्वकरम्यककाम्पिल्लकपाटलीत्वचः त्रिफलापीलुपियालकुवलबदरकर्कन्धुकाश्मर्यपरूषकद्राक्षानीलिनीक्लीतनिकोदकीर्याविडङ्गपूगपञ्चाङ्गुलफलानि चतुरङ्गुलफलपत्राणिपूतिकत्वक्फलपत्राणि महावृक्षसप्तपर्णज्योतिष्मतीक्षीराणि क्षीरमस्तुमद्यधान्याम्लमूत्राणि चेति विरेचनोपयोगीनि** ( असंसू. १४.४ )
विरेचनामध्ये उपयोगात आणावयाची द्रव्ये— उदा० निशोत्तर, दातीमूळ, उंदीरकानी, साखवेल, शिकेकाई, अजवला, मेढशिंगी, वेखंड, इंद्रायण, वरधारा, पिवळा धोत्रा, चित्रक, अघाडा, लघुपंचमूळ, वसू, पुनर्नवा, चाकवत, साग व सालई वृक्ष यांची मुळे, तिल्वकलोध्र, बकाणनिंब, कपिलावृक्ष, पाडळ यांची साल, त्रिफळा, पीलु, चारोळी, कुवल इ० बोरीचे वृक्ष, शिवण, फालसा, द्राक्ष, नीळ, क्लीतनक ( निळीचाच भेद ), घाणेरा करंज, वावडिंग, सुपारी, एरंड, यांची फळे, बाहव्याची पाने, करंजाची साल, व पाने, महारुख, सातवीण, मालकांगोणी, यांचे चीक व शिवाय दूध, दह्याची निवळ, मध, कांजी व निरनिराळे मूत्र ही सर्व विवेचनोपयोगी द्रव्ये आहेत.

**विरेच्य**–वि., **विरेचनार्हः, विरेचनयोग्यः** ( चसि. २.१३; सुचि. ३३.३२ )
ज्यांना विरेचन देणे इष्ट आहे असा.

**रोचन**–पु., **वनस्पति० घृतपर्णः** ( रा. ९.१७८ )
घृतकरंज.
**वनस्पति० रोहितकः** ( रा. ८.२१७ ) रक्तरोहिडा.

**वेरोध**–पु., **विरुद्धत्वम्** ( असंसू. ९.२४ ) विरोध.

**विरोहिन्**–वि., **प्राप्तरोहम्, अङ्कुरितम्** ( सुसू. २०.८ )
मोड आलेला, अंकुर फुटलेला.

**विलक्ष**–वि., **चलदृष्टिः** ( अहृसू. ७.१२ ) चंचलदृष्टि.

**विलङ्घन**–न., **उपक्रम० विविधलङ्घनम्** (सुउ. ५६.१२)
विविध प्रकारचे लंघन.

**विलम्बन**–न., **कालातिपातः** ( असंसू. ३.९३ )
विलंब, उशीर.

**विलम्बिका**–स्त्री., **रोग०** ( सुउ. ५१.५६ )
**भोजनं कफवातदुष्टं सत् यस्य ऊर्ध्वम् अधश्च न प्रवर्तते तत्र एवंलक्षणको व्याधिः विलम्बिकाभिधां भजते । आयुर्वेदज्ञाः ताम् अतिदुश्चिकित्स्याम् अतएव असाध्यामाहुः** ( सुउ ५६.३-९ )
विलंबिका नावाचा विकार. भोजन कफवातामुळे दुष्ट होऊन त्याचे–अध-ऊर्ध्वप्रवर्तन होत नाही. या लक्षणांनी युक्त व्याधीला विलंबिका हे नाव आहे. आयुर्वेदतज्ञांनी हा विकार चिकित्सेला अति कठीण म्हणून असाध्य म्हटले आहे.

**विलम्बिमुष्क**–वि., **रोगलक्षण० विलम्बितौ मुष्कौ यस्य सः** ( असंउ. ३१ )
ज्याचे अंडकोश लोंबले आहेत असा.

**विलय**–पु., **लयो नाम लीनत्वम्** ( अहृसू. २५.२८ )
विरणे, मिळून जाणे.

**विलयन**–न., **द्रवभावः** ( ड. सुउ. ५१.४९ )
पातळ होणे.

**विलापन**–वि., **द्रवत्वकरम्** ( सुचि. २४.५१ )
पातळ करणे.

**विलायन**–वि., **विलायको नाम विलयनकरः** (असंउ.३०)
नाश होणे.

**विलिङ्ग**–वि., **विगतसहजलक्षणः** ( चइ. ४.१६ )
मूळची लक्षणे नाहीशी झालेला.

**विलुलित**–वि., **आलोडितम्** ( चवि. ७.२१ )
एकत्र घुसळलेले किंवा कालवलेले.

**विलेखा**–स्त्री., **तिर्यगृजुवक्रा विविधा लेखा, अयं दहनविशेषः** ( सुसू. ११.१२ )
डाग देण्याच्या प्रकारापैकी तिरकस, सरळ, वाकडी इ. प्रकारे रेषात्मक डाग देण्याचा प्रकार.

**विलेपिका**–स्त्री., **कृतान्न०** ( चसू. २७.२५१ )
चौपट पाणी घालून केलेली कण्हेरी.

**विलेपी**–स्त्री., **कृतान्न० यवागू० बहुसिक्था लेह्या, सा च चतुर्गुणैर्जलैः सिध्यति । तद्गुणाः–तर्पणी हृद्या ग्राहिणी बलवर्धनी पथ्या लघ्वी दीपनी क्षुतृषापहा च** ( सुसू. ४६.३४३-३४४ ) **सा च व्रणाक्षिरोगसंशुद्धस्नेहपायिनां हिता**
(चसू. २७. २५१; अहृसू. ६.२९; सुचि. ३९.८-९)

विलेपी. धान्याचे चौपट पाणी घालून ते बरेच आटवून पुष्कळ शिते असलेली व चाटण्याजोगी दाटसर चिकट तयार झालेली पेज, ही विलेपी-तृप्तिकारक, हृद्य, मल घट्ट करणारी, बलवर्धनी, पथ्यकर, पचायला हलकी, अग्निदीपक, भूक-तहान शमवणारी आहे. व्रण, डोळ्याचे रोग, शोधन घेतले असता हितावह.

**विलोचन**-वि., **रोगलक्षण० वक्रनेत्रः** (ड. सुउ. ६१.९) डोळे वाकडे होणे.

**विलोडित**-न., **जाङ्गमद्रव्य० तक्रभेदः मथितम्** ( ध. ६.१८९ )
पाणी ¼ घालून दही घुसळून केलेले ताक ( मठ्ठा )

**विलोभन**-न., **लोभः लुब्धत्त्वम्** ( सुउ. ४८.१६ )
रोग्याच्या तोंडाला पाणी सुटेल असा आंबट चिंच इ० पदार्थ दाखविणे. समक्ष खाणे.

**विलोमत्व**-न., **लक्षण० पर्याकुलत्वम्** ( चचि. १७.२० )
व्याकुळ होणे.

**विवर**-न., **अवकाशः** (सुचि. १५.३) पोकळी, अवकाश.

**विवरण**-न., **यंत्रकर्म० प्रसारणम्, अंगुल्यादिभिः संपीड्य शल्याद्याहरणम्** ( सुसू. ७.१७ )
यंत्रकर्मविशेष, विस्तृत करणे, अंगुली इत्यादींनी दाबून शल्य वगैरे काढणे.

**विवर्जन**-न., (परिव०) **परिहरणम्** ( सुचि. २.५१ )
वर्ज्य करणे, टाकणे, सोडणे.

**विवर्ण**-वि., **मलिनवर्णम्** ( सुक. १.१८-२३ )
रंग बिघडलेले, मलिन वर्ण.
**विविधवर्णम्** ( सुक. ५.४१ ) **वर्णान्तरमापन्नम्** ( सुसू. ४५.६४ )
बऱ्याच प्रकारचा रंग, मूळचा रंग जाऊन दुसऱ्या रंगात रूपांतर झालेले.

**-ता**-स्त्री., **लक्षण० वर्णविपर्ययः** ( चसू. २८.१६ )
संपूर्ण रंग बदलणे.

**-दन्तता**-स्त्री., **मलिनदन्तता** ( कासू. २०.६ )
दात अस्वच्छ असणे.

**-पुष्प**-न., **अनुज्ज्वलवर्णबिन्दुः, दन्तादिष्वरिष्ट-लक्षणम्** ( सुसू. ३२.४ ) फिकट रंगाचे बारीक डाग. दात इ० वर असे डाग येणे हे मरणाचे क्षलण आहे.

**विवर्तन**-न., **विपरीतवर्तनम्, सन्धिमुक्तस्य सामान्य-लक्षणम्** ( सुनि. १५.६ )
दुसरीकडे वळणे, सांधे निखळल्याचे हे सामान्य लक्षण आहे.
**यन्त्रकर्म०** ( सुसू. ७.१७ ) यन्त्राचे काम.

**अन्यथात्वेन प्रवर्तनम्** ( गंगाधर, चशा. ८.१९ )
योजनेच्या विरुद्ध क्रिया घडणे.

**विवर्तित**-वि., **विपरीतं वर्तितम्** ( सुनि. १५.७ )
उलट बाजूने वळवलेले.

**विवर्धन**-न., ( परिव. ) **वृद्धिः** ( सुशा. ५.३ ) वाढ.

**विवस्वत्**-पु., **आदित्यः** ( सुसू. ६.८ ) सूर्य.

**विविक्त**-वि., **विभक्तम्** ( चशा. ७.१६ )
वेगळे. स्वतंत्र. विभक्त.

**-ता**-स्त्री., **सम्यक्पृथगवधारणम् मनस एवेन्द्रियार्थेषु सम्यगवधारणसामर्थ्यम्। रसादिधातुवहस्रोतसामनावृतत्वम्** ( सुचि. ३८.१४-१५ )
योग्य व स्वतंत्र जाणीव होणे. त्या त्या इंद्रियांना विषय ग्रहण करण्याचे व नीट समजण्याचे मनःसामर्थ्य. रसादि धातुवह स्रोतसे खुली होणे.

**-प्रियता**-स्त्री., **लक्षण० विजनप्रियता, विविक्तप्रियता नाम एकान्तप्रियता** ( चचि.९.१४ ) एकान्तप्रियता.

**-स्थ**-वि., **विजने स्थितः** ( अहृसू. ८.३६ )
एकांतात असलेला.

**विविध**-वि., **अनेकविधम्** ( असंउ. १६.१ )
अनेक प्रकारचा.

**विविधाकार**-वि., **विविधलक्षणः** ( सुउ. ६०.६ )
निरनिराळ्या आकाराचा, स्वरूपाचा.

**विविधाभिमत**-न., **आसुत०** ( ध. ६.२४६ )
आसवाचा पर्याय शब्द.

**विविधाशितपीतीय**-वि., **अध्यायसंज्ञा०** ( चसू. २८.१ )
अध्यायाचे नाव. अनेक खानपानांच्या विचारांचा.

**विवृत**-वि., **अनाच्छादितम्** (सुचि.२४.११७) रुंद, उघडे. **विस्तीर्णम्** ( अहृसू. २९.४९) **व्यात्तम्** (सुचि. ८.९)
लांब रुंद, विस्तृत.

( **विवृता** )-स्त्री., **क्षुद्ररोग० तल्लक्षणानि-पित्तेन पक्वोदुम्बरसन्निभा महादाहज्वरकरी विवृतानना वृत्ता पिटिका** ( असंउ. ३६ )
क्षुद्ररोग. याची लक्षणे—
पित्तामुळे पक्व उंबराच्या फळाप्रमाणे काळसर तांबूस रंगाची, अत्यंत दाह व ज्वरकारक रुंद तोंडाची वाटोळी पुळी.
वि., **विवृतमुखी योनि** ( चचि. ३०.४४ )
विस्तृत मुख असलेली ( योनी ).

प्रसृतद्वारा ( धमनी ) ( सुनि. १०.१७ )
जिचे तोंड विस्तृत झाले आहे अशी धमनी.

**–शायिनी**–वि., **अनावृते देशे शयनशीला (गर्भिणी)** ( चशा. ८.२१ )
उघड्यावर झोपण्याची सवय असलेली (गर्भिणी).

**विवृताक्ष**–वि., **लक्षण० उच्चलिताक्षः** ( सुउ. ६१.९ )
डोळे वर गेलेला. डोळे वटारलेला.
**स्तब्धाक्षः** ( सुचि. ७.३१ ) डोळे ताठलेला.

**विवृत्त**–वि., **वक्रम्** ( सुचि. ३.३७ ) वाकडे.

**विवृत्ताक्ष**–वि., **व्यावर्तितनेत्रः** ( ड. सुक. ५.४२-४३ )
ज्याचे डोळे गरगर फिरत आहेत असा.

**विवेक**–पु., **विच्छेदः** ( चशा. ४.१२ ) अलग करणे.
**पृथक्करणम्, वायुकर्मणामन्यतममिदम्** ( सुसू. १५.४( १ )
वेगळे करणे–वायूच्या अनेक कार्यांपैकी हे एक कार्य.

**विवेचन**–वि., **विवर्धनम्** ( सुचि. २४.५६ )
मोठे करणे.
न., **विभजनम्** ( अहसू. १२.८ ) वेगळे करणे.

**विशद**–वि., **गुण० क्षालने शक्तिः** ( हे.अहसू. १.१८ )
स्वच्छ करण्याची शक्ति.
**अपिच्छिलम्** ( ड. सुचि.३१.११ )
बुळबुळीत नसलेले.
**रूक्षम्** ( सुचि. १२.२० ) **तस्य कर्माणि–क्लेदाचूषणरोपणः असन्धानः, अजीवनः, अश्लेषी च** ( सुसू. ४६.५१७ )
रूक्षाची कामे–ओलावा शोषणे, व्रण भरून आणणे, फुटलेले, फाटलेले न जोडणे, जीवनाला अहितकर, आणि न चिकटू देणे.

**–करण**–वि., **विशदेंद्रियः देहः यद्वा विशदेंद्रियत्वम्** ( ड. सुउ. ६४.८४ )
इंद्रिये स्वच्छ असलेला देह, इंद्रिये स्वच्छ असणे.

**विशर्धित**–न., **पायुकृतः कुत्सितशब्दः** ( सुक. ३.४ )
गुदमार्गाने निघणारा घाणेरडा आवाज. पादणे.

**विशल्यघ्न**–वि., **मर्म० विशल्यप्राणहराणि वायव्यानि शल्यमुखावरुद्धो यावदन्तर्वायुस्तिष्ठति तावज्जीवति, उद्धृतमात्रे तु शल्ये मर्मस्थानाश्रितो वायुर्निष्क्रामति, तस्मात् सशल्यो जीवत्युद्धृतशल्यो म्रियते** ( सुशा. ६.१६ ) **त्रीणि विशल्यघ्नानि उत्क्षेपौ द्वौ एका स्थपनी चेति** (सुशा. ६.११)
मर्मस्थानातील एक प्रकार; ही वायव्यगुणाची असतात; ह्या ठिकाणी शल्य जाऊन तोंड अडले असता ते शल्य आत असेतो जगतो व ते काढताच त्या मर्मस्थानातील वायु निघतो. म्हणूनच शल्य आत असेतो जगतो व ते बाहेर काढताच मृत्यु येतो. अशी विशल्यघ्नमर्मस्थाने ३ आहेत. त्यांतील दोहोंना उत्क्षेप मर्मे असे नाव असून एकाला स्थपनी असे नाव आहे.

**विशल्या**–स्त्री., **वनस्पति० गर्भपातनी** ( असंउ. ४२ )
कळलावी. गर्भपातकारक वनस्पति.
**वनस्पति० लांगली** ( असंउ. २६ ) कळलावी.
**वनस्पति० पाटला** ( ड. ) **'गुडूची'–(हाराण)** ( सुशा. १०.११ )
गुळवेल.
**वनस्पति० अग्निशिखवृक्षः** ( सुचि. १८.४८-४९ )
कळलावी.
**वनस्पति० काष्ठपाटला** ( ड. सुक. ५.६१ )
पांढरी पाडळ.
**वनस्पति० इन्द्रवारुणी** ( ड. सुउ. ५५.४९ )
इंद्रावण, कवंडळ.
**वनस्पति० दन्ती** ( ध. १.१.२२३ ) दातीमूळ.
**वनस्पति० कलिकारी** ( ध. ४.९ ) कळलावी.

**विशस्त**–वि., **छिन्नम्** ( सुनि. १०.१९ ) तुटलेले.

**विशाख**–पु., **पुरुषशरीरग्रह०** ( असंउ. ३ )
पुरुषवाचक ग्रह (स्कंदापस्मार).
**वनस्पति० पुनर्नवा** ( ध. १.२७४ ) पुनर्नवा.

**–संज्ञ**–वि., **ग्रह० विशाख इति संज्ञा यस्य सः, स्कन्दापस्मारस्य द्वितीयं नाम** ( सुउ. २९.९ )
स्कंदापस्माराचे दुसरे नाव.

**विशारद**–वि., **यः शरीरे चैव शास्त्रे च दृष्टार्थः, स विशारदः चिकित्साकुशलः स्यात्** ( सुशा. ५.५१ )
जो शरीरविषयक ज्ञानात, तसाच शास्त्रीय ज्ञानातही निष्णात असून प्रत्यक्ष अनुभवाचेही ज्ञान आहे तो विशारद होय.
पु., **वनस्पति० बकुलः** ( ध. ५.१५४ ) बकुळ.
वि., **पण्डितः** ( सुसू. ३४.७ ) विद्वान, हुषार.
पु., **सप्तविंशतिसंख्याकेष्वन्यतमो रससिद्धिप्रदायकः** ( र. १.२,५ )
रसशास्त्रात सिद्धि मिळवलेल्या २७ आचार्यांपैकी एक रससिद्ध ऋषि.

तन्त्रकारविशेषः, विदेहः, **निमिः** ( सुउ. १.१२ )
निमि – डोळ्यांसंबंधी शास्त्र सांगणारा.
एक विशेषग्रंथकार, नेत्रशास्त्रज्ञ.

**(विशारदा)**–स्त्री., **वनस्पति० धन्वयासभेदः, क्षुद्रदुरालम्भा** ( रा. ३.२२ ) लहान धमासा.

**विशाल**–वि., **विस्तीर्णम्** ( सुसू. ५.८ ) मोठे मोठे.

**(विशाला)**–स्त्री., **वनस्पति० इन्द्रवारुणी** ( सुचि. ९.८ )
कडुइंद्रावण, कवंडळ.

**(विशाली)**–स्त्री., **वनस्पति० अजमोदा** (रा. ६.१५१)
ओव्याचा प्रकार.

**–पत्र**–पु., **वनस्पति० श्रीतालः** ( रा. ५.९५ )
ताडप्रकार.
**वनस्पति० कासालुः** ( रा. ७.२८ ) कासाळु.

**–फलिका**–स्त्री., **वनस्पति० निष्पावी** ( रा. ७.१०० )
पावट्याचा प्रकार, आबई.

**विशालाक्षी**–स्त्री., **वनस्पति० नागदन्ती** ( रा. ५.२६ )
नागदन्ती.

**विशालोपोदकी**–स्त्री., **वनस्पति० उपोदकी** (रा. ७.७४) घोळीचा प्रकार.

**विशिख**–पु., **वनस्पति० शरः** (रा. ८.२११) कासतृण.
वि., **खण्डितम् (पात्रादि)** ( चक्र. चइ. १२.३४ )
छिन्नभिन्न. भांडे वगैरे.

**(विशिखा)**–स्त्री., **कर्ममार्गः, रुग्णस्य निवासः, रथ्या** ( सुसू. १०.१; चसू. २९.९ )
यज्ञयागादी यथासांग करण्याची पध्दती.
रोग्याचे वसतिस्थान. राजमार्ग.

**विशिखानुप्रवेशनीय**–वि., **अध्यायसंज्ञा०** ( सुसू. १०.१ ) अध्यायाचे नाव.

**विशिखान्तर**–न., **अपत्यमार्गः, अपत्यपथाभ्यन्तरम्** ( सुशा. १०.९ )
मुलाचा जन्मण्याचा मार्ग, गर्भाशय आणि योनि-मार्गामधील भाग.

**विशिष्ट**–न., **खनिजधातु० सीसकम्** (ध. ६.२१) शिसे.

**विशीर्ण**–वि., **पतितम्** ( असंसू. ४.३१ ) पडलेले.

**–पर्णी**–स्त्री., **वनस्पति० निम्बः** ( रा. ९.४४ )
कडुनिंब.

**–वाच्**–वि., **लक्षण० अस्फुटवचनः** ( चचि. १७.४७ )
अस्पष्ट बोलणारा.

**विशुद्ध**–वि., **शुद्धम्** ( अहृसू. १३.१६ ) शुद्ध, निर्मल.
**मलरहितम्** ( सुचि. २४.१८ ) मळ नसलेले.
न., **वनस्पति० आलकम्** ( ध. १.८९ )
सालवणप्रकार.

**–देह**–वि., **वमनविरेचनाभ्यां विशेषेण शुद्धः देहो यस्य, सः । शुद्धतनुः** ( सुउ. ५६.१३ )
वमन विरेचन क्रियांनी ज्याचा देह शुद्ध झाला आहे असा.

**–रक्त**–वि., **शुद्धरक्तः** ( असंसू. ३६.२५ )
विशेष शुध्द रक्त.

**–वर्ण**–वि., **प्रकृतिसिद्धवर्णम्** ( सुउ. १५.१९ )
प्रकृतिप्रमाणे असणारा रंग.

**विशुद्धोपचित**–वि., **पूर्वं विशुद्धः कृतसंसर्जनत्वात् पश्चात् उपचितः** ( सुचि. २६.३९ )
पूर्वी केलेल्या शुद्धिसंस्कारामुळे नंतर चांगली शरीर-वाढ व पुष्टी ज्याची झाली आहे असा.

**विशुष्करेतस्**–वि., **स्वमानादत्यर्थं क्षीणरेताः ( पुरुषः )** ( सुसू. १.८(८)
ज्याचे शुक्र नैसर्गिक प्रमाणाहून अधिक क्षीण झाले आहे असा.

**विशुष्कान्न**–न., **शुष्कमन्नम्** ( सुसू. ४६.४९६ )
कोरडे अन्न.

**विशेष**–पु., **भेदः** ( चसू. १.६४ ) मेद.
**वैशेषिकसंमतषट्पदार्थेषु द्रव्यगुणकर्मादीनामन्य-तमः** ( चवि. ८.२९ )
वैशेषिकांनी सांगितलेल्या द्रव्यगुणकर्मादि सहा पदार्थांपैकी एक.
**अतुल्यार्थता, असमानो धर्मः** ( चसू १.४४-४५ )
समानधर्म नसणे.
**उपशमः ( प्रकरणवशादयमर्थोऽत्र )** ( ड. सुउ. २५.५ )
शमन करणे, शमनप्रकरणानुसार हा अर्थ येथे आहे.
**शब्दादिः, सुखदुःखादिभिरनुभाव्यैर्धर्मैर्विशिष्य-माणत्वाद्विशेषः**
सुखदुःखादींनी अनुभवास येणारे विशेष भाव.

**विशेषक**–पु., **वनस्पति० तिलकः** ( ध. ५.१५८ )
छत्रीसारखी फुले येणारी तिळवा वनस्पती.

**विशेषण**–न., **विशेषः** ( सुउ. ४२.१४ )
इतराहून अधिक.

**विशोक**–पु., **वनस्पति० अशोकः** (ध. ५.१५९) अशोक.

**विशोधन**–पु., **आरग्वधो दन्ती वा** ( र. २१.१३९ )
बहावा किंवा दाती.

**( विशोधनी )**-स्त्री., **वनस्पति० नीलिनी** ( ध. १.२३२ )
नीली, काळा दाणा.
**वनस्पति० नागदन्ती** ( रा. ५.२६ ) नागदन्ती.
**वनस्पति० दन्ती** ( रा. ६.३३९ ) दाती.
**–वधू**–स्त्री., **शुनी, शुनकचिल्लीशाकं वास्तुभेदः** ( र. २१.१३९ )
चाकवतप्रकार.

**विशोध्य**–वि., **शोधनार्हः** ( सुचि. ३३.४२ )
शोधनाला योग्य.

**विशोष**–पु., **लक्षण० विशेषेण शोषः** ( सुउ. ४८.७ )
टाळू, कंठादींचे ठिकाणी विशेष कोरड पडणे.

**विशोषण**–न., **लंघनम्** ( इन्दु. असंचि. ११ ) **उपक्रम० लघुरूक्षाल्पभोजनम्** ( सुउ. ५२.२८-२९ )
वि., **द्रवस्निग्धयोः शोषणः** ( सुसू. ३८.१३ )
हलके, रूक्ष व थोडे भोजन, द्रव व स्निग्धाचे शोषण करणारा आहार.

**विश्रगन्धा**–स्त्री., **वनस्पति० हपुषा** ( ध. २.९ )
हपुषा, खडशेरणी.

**विश्रब्ध**–वि., **जातविश्रम्भः विश्वस्तः** ( अहसू. २.२७ )
विश्वास ठेवलेला.

**विश्रमण**–न., **विश्रान्तिः** ( अहसू. ४.१५ )
विश्रान्ति.

**विश्रा**–स्त्री., **वनस्पति० हपुषा** ( ध. २.९ )
खडशेरणी.

**विश्लिष्ट**–वि., **विघटितः** ( **सन्धिः** ) ( सुचि. ३.२० )
निखळलेला ( सांधा ), ढळलेला.
**स्वस्थानात् च्युतः** ( सुचि. २.७७ )
स्वतःच्या स्थानातून सुटलेला.
**–देह**–वि., **भग्नशरीरः** (असंउ. ३१) **तस्य चिकित्सा– स्वस्थानच्युतावयवो देहः तैलपूर्णायां द्रोण्यां स्थापनीयः अशनार्थं च मांसरसादिकं दातव्यम्** ( सुचि. २.७७-७८ )
शरिराचा निखळलेला किंवा मोडलेला अवयव; त्यावर उपचार–स्वस्थानाहून निखळलेला अवयव असलेल्या शरिराला तेल भरलेल्या कुंडीत ठेवावे. आणि खाण्याला मांसरसादी द्यावे.
**–वक्षस्**–वि., **लक्षण० अवसन्नवक्षाः पीडितवक्षाः** ( ड. सुउ. ५२.११ )
ज्याची छाती खचली किंवा दबली आहे असा.
**–सन्धि**–वि., **च्युतसन्धिः** ( असंसू. ७.४७ )
सांधा निखळलेला आहे असा.

**विश्लेष**–पु., **विभागः विभक्तीकरणम्** (चक.१२.४८-४९)
वेगळा भाग, वेगळे करणे.
**सन्धीनां प्रसारणादौ अप्रवृत्तिः** ( ड. सुक. २.२९-३० )
सांधे लांब आखुड करावेसे न वाटणे.

**विश्लेषण**–वि., **लवणरसस्य गुणः ।**
लवण रसाचा गुण, पाझरणे.
**प्रत्यवयवानां पृथक्करणः, छेदित्वात्** ( सुसू. ४२.१०(३) )
छेदन गुणामुळे प्रत्येक अवयवास वेगळे करणारा.

**विश्व**–न., **वनस्पति० शुण्ठी** (चचि. ३.२५०) शुंठी, सुंठ.
**वनस्पति० बोलम्** ( रा. ६.११७ ) बोळ.

**( विश्वा )**–स्त्री., **शुण्ठी** (ड. सुचि. ३७.२०) शुंठी, सुंठ.
**वनस्पति० अतिविषा** ( ध. १.१० ) अतिविष.
**–कर्मन्**–वि., **विश्वकर्मैकरणक्षमः** ( **विश्वकर्मा** ) ( चशा. २.३२ )
विश्वाचे कार्य करण्यास समर्थ असा ( विश्वकर्मा ) आत्मा.
पु., **आत्मा** ( चशा. ४.८ ) आत्मा, जीव.
**–गन्ध**–न., **भैषज्य० बोलम्** ( रा. ६.११७ ) बोळ.
**वनस्पति० पलाण्डुः** ( रा. ७.१०१ ) कांदा.
**–ग्रन्थि**–स्त्री., **वनस्पति० हंसपादी** ( ध. ४.१११ )
हंसपदी, राजहंस.
**–देवा**–स्त्री., **वनस्पति० गांगेरुकी** ( ध. १.२८४ ) **सितकुसुमानाम्नीबला०** ( ड, सुशा. २.३२; असंशा. १.६१ ) पांढऱ्या फुलांची बला.
**–धूपक**–न., **वनस्पति० अगरु** ( ध. ३.२५ ) अगरू.
**–पर्णी**–स्त्री., **वनस्पति० तामलकी** ( रा. ५.१४५ )
भुईआवळी.
**–भेषज**–न., **वनस्पति० शुण्ठी** ( ध. २.८२ ) सुंठ.
**–रूप**–पु., **आत्मा** ( चशा. ४.८ ) आत्मा.
वि., **नानारूपः** ( **विकारः** ) ( सुउ. ६१.२१ )
विविध स्वरूपाचा.
**–( रूपा )**–स्त्री., **वनस्पति० अतिविषा** ( रा. ६.७ )
अतिविष.
**–रूपक**–न., **वनस्पति० कालेयकम्** ( रा. १२.४० )
अगरू.
**–हित**–पु., **योग० पारदसंलिप्तताम्रगन्धकेन मारयित्वा तत्समं चित्रकं हरितालं सम्पिण्डितं त्रिदिनं मर्दयेत् । मात्रा–वल्लद्वयम् । अनुपानं–**

**मरिचचूर्णं घृतयुक्तम्, निर्गुण्ड्यादिर्लेपोऽनेन सार्कं प्रयोज्यः। अयं कुष्ठघ्नः** ( र. २०.५७ )
विश्वहित सिद्धौषधाचे नाव.
पान्याचा लेप दिलेल्या ताम्राचे गंधकाने मारण करून त्यामध्ये समप्रमाण चित्रक, हरताळ तीन दिवस घोटावे. हे कुष्ठावरचे औषध आहे. दोन वाल प्रमाणे मिरी व तुपाबरोबर तें द्यावे.
या बरोबरच निर्गुंडयादिलेप कुष्ठावर लावावा. तो कुष्ठघ्न होतो.

**विश्वम्भर**–पु., **सविषकीट० सौम्यः, अयं श्लेष्मप्रकोपणः कफविकारान् करोति** ( सुक. ८.१२ ) **तैश्च दष्टे दंशः सर्षपाकाराभिः पिडकाभिः सरुजाभिश्चीयते शीतज्वरार्तश्च पुरुषो भवति** ( सुक. ८.३२ )
हा एक विषारी किडा आहे. सौम्य आहे. हा कफ-प्रकोपक आहे, (दंशाने) कफाचे विकार करतो. दंशस्थानी मोहरीच्या आकाराच्या पीडायुक्त पुळ्या उठतात आणि दंश झालेल्याला थंडीतापाची पीडा होते.

**विश्वाख्या**–स्त्री., **वनस्पति० शतावरी** ( रा. ४.४४० )
शतावरी.

**विश्वाची**–स्त्री., **वातरोग० बाहुपृष्ठतः अङ्गुलीनां तलं प्रति या कण्डरा वातदुष्टा सती बाहुचेष्टापहारिणीं विश्वाचीं करोति** ( सुनि. १.७५ )
हा एक वातरोग आहे. हाताच्या मागील बाजूने तळहाताच्या बोटांकडे जी कंडरा जाते ती वायूमुळे दूषित झाली असता हाताची हालचाल बंद करते. अशा ह्या विकाराला विश्वाची हे नाव आहे.

**विश्वामित्र**–पु., **ऋषि० रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिषु एकः** ( चसू. १.१० )
रोगनाशनाचा विचार करण्यासाठी हिमालयाच्या परिसरात जमलेल्या ऋषींपैकी एक.

**विश्वौषध**–न., **वनस्पति० शुण्ठी** ( ध. २.८२ ) सुंठ.

**विष्**–स्त्री., **पुरीषम्** ( चसू. १.६९; सुउ. ५५.४ )
विष्ठा, मळ.

**( विट् )-क्षय**–पु., **पुरीषक्षयः** ( अहसू. ११.३२ )
मळाचा क्षय.

**–खदिर**–पु., **वनस्पति० खदिरः** ( रा. ८.३८ ) खैर.

**–प्रभ**–वि., **मूत्रपुरीषगन्धी विट्ग्रहणेन अत्र पुरीषं मूत्रं च गृह्यते मलमूत्रवाचकत्वात् विट्शब्दस्य** (ड. सुशा. २.१०)
ज्याला मूत्राचा व मळाचा दुर्गंध येत आहे असा, या ठिकाणी विट् ह्या शब्दाने मळ मूत्र दोन्हींचा अर्थबोध घ्यावयाचा आहे. कारण विट् हा शब्द मल व मूत्राचाही वाचक आहे.

**–प्रभशुक्र**–न., **मूत्रपुरीषगन्धिशुक्रम्, तस्य चिकित्सा– विट्प्रभे शुक्रे चित्रकोशीरहिङ्गुभिः सिद्धं घृतं पाययेत्** ( सुशा. २.१० )
मल मूत्राच्या गंधाचे शुक्र. त्यावर उपचार–चित्रक, वाळा, हिंगानी सिद्ध केलेले तूप प्यावे.

**–प्रवृत्ति**–स्त्री., **पुरीषप्रवृत्तिः** ( अहसू. ४.४ )
मलप्रवृत्ति.

**–शूल**–न., **रोग० शूलभेदः, अयं वातप्रकोपात् रुद्ध-मलेन भवति। रूक्षाहारस्य कोष्ठमलरुद्धता अग्नि-मांद्यम्, स्रोतोरोधात् दक्षिणं वामं वा कुक्षि-मादाय तीव्रशूलः, वायुवर्धनं सघोषं, पिपासा, भ्रमः मूर्च्छा मूत्रपुरीषोत्सर्गेणापि शान्त्यप्रतीतिः** ( सुउ. ४२.१३६-१३९ ) **तस्य चिकित्सा–स्वेदनं, शमनं निरूहस्नेहबस्तयः, कोष्ठशोधनं, उदावर्त-चिकित्सा च कर्तव्या** ( सुउ. ४२.१४०-१४१ )
पोटदुखीचा प्रकार. वायूच्या प्रकोपाने मलावरोध होतो, त्यामुळे हा शूल होतो. या शूलात रूक्ष आहाराने कोठ्यामध्ये मल साठतो, अग्निमांद्य, स्रोतसांचा अवरोध झाल्यामुळे डाव्या किंवा उजव्या कुशीत दाह उत्पन्न करून तीव्र शूल होतो. आवाज करीत आतड्यात वायूचा संचार होतो. तहान, भ्रम, मूर्च्छा मल मूत्राच्या उत्सर्गाने सुद्धा शूल कमी होत नाही.
त्याची चिकित्सा–घाम काढणे, शमन औषध देणे, निरूह आणि स्नेह बस्ति देणे, कोष्ठशुद्धीचे उपचार आणि उदावर्त रोगावरील चिकित्सा करावी.

**( विड् )-गण**–पु., **पुरीषगणः। पारावतः, चाषः, कपोतः, मयूरः, गृध्रः कुक्कुटश्चेत्येषां विष्ठा; गणोऽयं पुटलेपनाभ्यां सर्वलोहशोधनः**( र. १०.९० )
पुरीषगण– पारवा, चाष, कबूतर, मोर, गिधाड, आणि कोंबडा ह्या पक्ष्यांच्या विष्ठेची पुटे व लेप सर्व धातूंच्या शुद्धीसाठी उपयुक्त आहेत.

**–ग्रह**–पु., **पुरीषसङ्गः** ( अहसू. १८.३९ ) मलावष्टंभ.

**–ग्रहणवर्ग**–पु., **पुरीषसंग्रहणीयः वर्गः, यथा– श्यामाऽनन्ता पद्मा कट्वङ्गः पद्मकेसरं लोध्रं धातकिकुसुमसमङ्गामोचरसाम्रास्थि** ( असंसू. १५.३१ )

मल घट्ट करणारा ( औषधी ) वर्ग. यात गुळवेल दूर्वा, भार्ङ्गी, टेटू, कमलकेसर, लोध्र, धायटीची फुले, लाजाळू, मोचरस आणि आंब्याची आठळी ही द्रव्ये येतात.

**–बन्ध**–पु., पुरीषबन्धः पुरीषसङ्गः (सुउ. ४०.१०६) मलावष्टंभ.

**–बल**–न., पुरीषेण प्राप्तं बलम् ( चचि. ८.४२ ) मलामुळे मिळालेली शक्ती.

**–भेद**–पु., लक्षण० द्रवपुरीषता, अशीतिवातविकारेष्वेकः ( चसू. २०.११; सुउ. ५४.१० ) पातळ शौचाला होणे. ऐंशी ( ८० ) वातविकारांतील एक रोग.

**–भेदिन्**–वि., पुरीषस्य भेदकम् । विड्भेदी ( अहृसू. ४.६ ) मळाचे खडे फोडून पातळ करणारा.

**–भ्रंश**–पु., शिथिलपुरीषस्य पतनम् (असंनि. २.१५) ढिला, सैल झालेला मळ पडणे.

**–मूत्रसंग्रह**–पु., रोगलक्षण० विण्मूत्रसङ्गः ( असंसू. ११.३४ ) मलमूत्राचा अवरोध होणे.

**–मूत्रार्ति**–स्त्री., मलमूत्रावरोधविकारः ( र. २२.१०१ ) मलमूत्राचा अवरोध आहे असा रोग.

**–राग**–पु., पुरीषस्य रक्तवर्णत्वम् ( काखिल. २.४४ ) मळाचा लालपणा.

**–रोध**–पु., पुरीषसङ्गः ( अहृसू. ४.६ ) मलावष्टंभ.

**–वम**–वि., पुरीषोद्वामी, पुरीषं वमन् (अहृसू. ४.२१) मळाची ओकारी ज्याला होते तो.

**–वहस्रोतस्**–न., पुरीषवहस्रोतः ( चचि. २०.१६ ) मलवहस्रोतस.

**–विघात**–पु., रोग० मूत्रकृच्छ्र० त्रयोदशबस्तिविकारेष्वेकः, तल्लक्षणम्–वायुना पीडितं शकृन्मूत्रस्रोतः प्रपद्यते, ततो विड्गन्धि विट्संसृष्टं च पुरुषः कृच्छ्रान्मूत्रयति ( चसि. ९.४३ ) मूत्रकृच्छ्र. बस्तीच्या तेरा विकारांपैकी एक. याने वायूने पीडित मूत्र व मल मूत्रमार्गात अडते. त्यामुळे विष्ठेच्या गंधाचे व विष्ठायुक्त असे कष्टाने लघ्वीला होते.

**–विरजनवर्ग**–पु., पुरीषविरजनवर्गः जम्बुसल्लकीप्रभृतिद्रव्ययुतः ( असंसू. १५.३२ ) मळाला रंग आणणारी द्रव्ये. जांभूळ, सालई इ० द्रव्यांनी युक्त.

**–वृद्धि**–स्त्री., पुरीषवृद्धिः ( अहृसू. ११.३२ ) मळाचे प्रमाण वाढणे.

**–सङ्ग**–पु., रोगलक्षण० पुरीषसङ्गः ( चचि. ५.१० ) मलसंग, मलावरोध.

**विष**–न., गरम्, प्राणनाशकद्रव्यम् ( चचि. २३; सुक. १.६ ) तदुत्पत्तिर्व्युत्पत्तिश्च–ब्रह्मा प्रजामसृजत् । कैटभो नाम दर्पितोऽसुरः सर्जने विघ्नमकरोत् । क्रुद्धस्य ब्रह्मणो मुखान्मूर्तिमान् क्रोधः समुत्पन्नः । स कैटभं ददाह, क्रोधस्य तेजस्तु वृद्धिं प्राप्तम् । तद् दृष्ट्वा देवाः खिन्ना अभवन् । खिन्नत्वं नाम विषादत्वम्, विषादजननत्वाद्विषम् । ब्रह्मा तं क्रोधं स्थावरजङ्गमेषु न्यस्तवान् ( सुक. ३.१८-२२ ) सुरासुरैरमृतार्थं मथ्यमाने समुद्रेऽमृतोत्पत्तेःप्राग्दीप्ततेजाश्चतुर्दंष्ट्रो हरिकेशोऽनलेक्षणो घोरदर्शनः पुरुषो जज्ञे । तं दृष्ट्वा जगद्विषण्णं जातम् । तेनासौ विषसंज्ञितः ( चचि. २३.४-५ ) तत्प्रकाराः–द्विविधं स्थावरं जङ्गमम् । त्रिविधं, स्थावरं जङ्गमं कृत्रिमं च ( ड. सुसू. ३४.४ ) दोषभेदेन त्रिविधम्–वातिकपैत्तिकश्लैष्मिकमिति (चचि. २३.१६९) तदाश्रयाः–स्थावरस्य दशाधिष्ठानानि–मूलं पत्रं फलं पुष्पं त्वक् क्षीरं सारो निर्यासो धातवः कन्दश्च; क्लीतकाऽश्वमारगुञ्जासुगन्धगर्गरककरघाटविद्युच्छिखाविजयानील्यष्टौ मूलविषाणि, विषपत्रिकालम्बावरदारुकरम्भमहाकरम्भाणि इति पञ्च पत्रविषाणि; कुमुद्वतीवेणुकाकरम्भमहाकरम्भकर्कोटरुकरेणुकखद्योतकचर्मरीभगन्धासर्पघातिनन्दनसारपाकानीति द्वादश फलविषाणि; वेत्रकादम्बवल्लीजकरम्भमहाकरम्भाणि इति पञ्च पुष्पविषाणि; अन्त्रपाचककर्तरीयसौरीयककरघाटकरम्भनन्दननाराचकानि इति सप्त त्वक्सारनिर्यासविषाणि; कुमुदघ्नीस्नुहीजालक्षीरीणि त्रीणि क्षीरविषाणि; फेनाश्महरितालं च द्वे धातुविषे; कालकूटवत्सनाभसर्षपपालककर्दमकवैराटकमुस्तकशृङ्गीविषप्रपुण्डरीकमूलकहालाहलमहाविषकर्कटकानीति त्रयोदश कन्दविषाणि; इत्येवं पञ्चपञ्चाशत् स्थावरविषाणि भवन्ति ( सुक. २.४-५ ) जङ्गमस्य षोडशाधिष्ठानानि–दृष्टिनिःश्वासदंष्ट्रनखमूत्रपुरीषशुक्रलालार्तवमुखसंदंशविशर्धिततुण्डास्थिपित्त, शूकशवानीति ( सुक. ३.४ ) तत्सामान्यगुणा उपपत्तिश्च–लघुरूक्षमाशु, विशदं, व्यवायि, तीक्ष्णं

विकासि, सूक्ष्ममुष्णमनिर्देश्यरसम् (चचि. २३.२४) तद्रौक्ष्याद्वायुं कोपयेत्; औष्ण्यात् सशोणितं पित्तं कोपयेत्; तैक्ष्ण्यान्मतिं मोहयेन्मर्मबन्धांश्च छिनत्ति; सौक्ष्म्यात् शरीराऽवयवान्प्रविशेद्विकरोति च आशुत्वादाशु हन्ति; व्यवायित्वात् प्रकृतिं भजेत्; विकाशित्वाद्दोषान्धातून्मलानपि क्षपयेत्, वैशद्यादतिरिच्येत; लाघवाद्दुश्चिकित्स्यम्; अविपाकित्वाद्दुर्हरं चिरक्लेशकारि च (सुक. २.१९-२३) विषदलक्षणानि—अपार्थं बहु संकीर्णं मूढवद्भाषते; अङ्गुलीः स्फोटयति, अकस्माद् भूमिं विलिखन् हसेदपि, वेपथुमान् भवति, त्रस्तश्चान्योऽन्यमीक्षते; क्षामो विवर्णवक्त्रो नखैः किञ्चिच्छिनत्ति असकृद्दीनः करेण शिरोरुहानालभेत्। अपद्वारैर्निर्यियासुः पुनः पुनर्वीक्षते (सुक. १.१९-२१) विषदानप्रकाराः—अन्ने, पाने दन्तकाष्ठेऽभ्यङ्गेऽवलेखने, उत्सादने, कषाये, परिषेकेऽनुलेपने स्रक्षु, वस्त्रेषु, शय्यासु, कवचाभरणेषु पादुकापादपीठेषु, गजवाजिनां पृष्ठेषु, विषजुष्टेष्वन्येषु नस्यधूमाञ्जनादिषु च विषप्रदानं संभवति (सुक. १.२५-२७) विषान्नपरीक्षा—विषान्नेन हुतभुग्भृशं चटचटायते, तीक्ष्णधूमो भवति, चिरान्नोपशाम्यति; जीवंजीवका विषं दृष्ट्वा म्रियन्ते; शुकसारिके क्रोशतः, हंसः क्ष्वेडति; भृङ्गराजः कूजति; मर्कटो विष्ठां मुञ्चति; (सुक. १.२८-३३) विषान्नपरिणामाः—आमाशयगतं विषं मूर्च्छांच्छर्दिमतीसाराऽध्मानदाहवेपथ्विन्द्रियवैकृत्यानि कुर्यात्; तत्राशु तण्डुलाम्बुदध्यादिसहितं मदनादिचूर्णैर्वामयेत्। पक्वाशयगतं विषं दाहमूर्च्छाऽतीसारतृष्णेन्द्रियवैकृताऽऽटोपकार्श्यपाण्डुताः कुर्यात्। तत्र ससर्पिष्कं नीलिनीफलचूर्णं विरेचनार्थमथवा दध्ना मधुसंयुतः दुषीविषारिः पेयो (सुक. १.४०-४३) उपक्षिप्तस्यान्नस्योर्ध्वं प्रसर्पता बाष्पेण हृत्पीडा, भ्रान्तनेत्रत्वं शिरोदुःखं च जायते (सुक. १.३४-३५) प्रमादान्मोहाद्वा तदन्नमुपसेवमानस्य जिह्वाऽष्ठीलावदरसवेदिनी भवति। सा तुद्यते दह्यते चाऽऽस्यात् श्लेष्मा प्रसिच्यते (सुक. १.३८-३९) तत्परिहारः—महासुगन्धिमगदमजेयघृतं, शतवर्षस्थितपुराणघृतं मयूरनकुलहरिणगोधादिमांसं वा हृदयाऽऽवरणार्थं दद्यात्। तीक्ष्णवमनविरेचनं सिराव्यधं क्षिप्रं कुर्यात्। भिन्नमध्यगो नित्यं हृदयावरणं कुर्यात्। सर्पिर्दधिपयः क्षौद्रं शीतलं जलं वा पिबेत् (सुक. १.७५-८०) तत्संप्राप्तिः—विषं देहं संप्राप्य प्राक् शोणितं दूषयति। ततः कफपित्ताऽनिलैः सहाशयान्दूषयति। ततो हृदयं संप्राप्य देहोच्छेदाय प्रभवति (असंउ. ४०) तदुपद्रवाः—षोडशोपद्रवाः—ज्वरकासवमिश्वासहिक्कातृष्णाऽतिमूर्च्छाव्रणदाहातिसारबस्तिरुजाशोथपूतिगन्धत्वरक्तस्रावाग्निमन्दताः (असंउ. ४७) स्थावरविषलक्षणानि—सप्त वेगाः—प्रथमे वेगे—जिह्वाश्यावता, स्तम्भो, मूर्च्छा, त्रासः, क्लमो वमिश्च; द्वितीये—वेपथुः, स्वेदो, दाहः, कण्ठवेदना, आमाशयप्राप्तं सद् विषं हृदि वेदनां जनयति; तृतीये—तालुशोष आमाशये शूलं, लोचनानां दुर्बलहरितशून्यत्वं च; चतुर्थे—पक्वाशयगते विषे हिध्मा, कासोऽन्त्रकूजनं शिरसोऽतिगौरवम्; पञ्चमे—कफप्रसेको वैवर्ण्यं, पर्वभेदः, पक्वाधाने वेदना सर्वदोषप्रकोपश्च; षष्ठे—संज्ञाप्रणाशो भृशमतीसारश्च; सप्तमे—स्कन्धपृष्ठकटीभङ्गो मृत्युश्च (असंउ. ४०) विषदिग्धशस्त्रविद्धलक्षणानि—मुहुर्मुहुः प्रताम्यति, विवर्णभावं भजते, आशु विषादं गच्छति; अस्य गात्रं कीटैरावृतमिव चिमिचिमायते। श्रोणिपृष्ठशिरःस्कन्धसन्धिषु संवेदनाः स्युः। कृष्णदुष्टाऽस्रस्रावस्तृण्मूर्च्छाज्वरदाहा दृष्टिकालुष्यवमथुश्वासकासाश्च भवन्ति। व्रण आरक्तपीतपर्यन्तः श्यावमध्योऽतिरुक् च व्रणगतं मांसं कृष्णतां गत्वा शूयते, सद्यः पच्यते च। प्रक्लिन्नमभीक्ष्णं जीर्यते सपिच्छिलपरिस्रुतश्च व्रणो भवति। (असंउ. ४०) जङ्गमविषाऽऽश्रयाः—दृष्टिनिःश्वासविषा दिव्याः सर्पाः; भौमास्तु दंष्ट्राविषाः; मार्जारश्ववानरमकरमण्डूकपाकमत्स्यगोधाशम्बूकप्रचलाकगृहगोधिकाचतुष्पादकीटास्तथाऽन्ये दंष्ट्रानखविषाः चिपिटपिच्चिटककषायवासिकसर्षपकतोटकवर्चःकीटकौण्डिन्यकाः शकृन्मूत्रविषा मूषिकाः, शुक्रविषाः, लूता लालामूत्रपुरीषमुखसंदंशनखशुक्राऽऽर्तवविषा वृश्चिकविश्वम्भरवरटीराजीवमत्स्योच्चिटिङ्गाः समुद्रवृश्चिकाश्चालविषाः; चित्रशिरःसरावकुर्दिशतदारुकारिमेदकसारिकामुखा मुखसंदंशविशर्धितमूत्रपुरीषविषाः, मक्षिकाकणभजलायुका मुखसंदंशविषाः विषहृतास्थि सर्पकण्टकवरटीमत्स्यास्थि चेत्यस्थिविषाणि, शकुलीमत्स्यरक्तराजिवरकीमत्स्याश्च पित्तविषाः, सूक्ष्मतुण्डोच्चिटिङ्गवरटीशतपदीशूकवलभिकाशृङ्गिभ्रमराः शूक-

**तुण्डविषाः; कीटसर्पदेहा गतासवः शवविषाः शेषास्त्वनुक्ता मुखसंदंशविषेष्वेव गणयितव्याः** ( सुक. ३.५ ) **सामान्यचिकित्सा-प्रथमे विषवेगे वान्तं शीताम्बुना अभिषिञ्चेत् मधुसर्पिर्भ्यां समायुतमगदं पाययेत्; द्वितीये वान्तं विरेचनं पाययेत्; तृतीयेऽगदपानं नस्यमञ्जनं च हितम्; चतुर्थे स्नेहसंमिश्रमगदं पाययेत्; पञ्चमे क्षौद्रमधुककाथयुक्तं तं प्रदापयेत्; षष्ठेऽतीसारवत्; सप्तमेऽवपीडः; मूर्ध्नि काकपदं कृत्वा सासृक् पिशितं क्षिपेत्** ( सुक. २.४०-४३ ) **तदपथ्यानि-तिलमद्यकुलत्थक्षुत्तृड्भयाऽऽयासमैथुनदिवास्वप्नाश्च** (असंउ. ४७) **विषरहितपुरुषलक्षणानि-प्रसन्नदोषः स्वभावाऽवस्थितवातादिकः, प्रकृतिस्थधातुरन्नाभिकाङ्क्षः सममूत्रजिह्वः, प्रसन्नवर्णेन्द्रियचित्तचेष्टो नरोऽविष इति जानीयात्** ( सुक. ६.३२ )

विष, गर, प्राणघातक द्रव्य. विषाची उत्पत्ति व व्युत्पत्ति- ब्रह्मदेवाने पृथ्वीतील प्राण्यांचे सृजन केले त्या वेळी कैटभ नावाच्या क्रूर राक्षसाने सृष्टि निर्माण कार्यात विघ्न उत्पन्न केले. संतापलेल्या ब्रह्मदेवाच्या मुखातून क्रोधाग्नीच्या ज्वाला बाहेर आल्या. त्या ज्वालांनी कैटभ जळाला. क्रोधाला मात्र तेज आणि वृद्धि प्राप्त झाली. हे पाहून देव खिन्न झाले. खिन्नत्व म्हणजेच विषादत्व. विषाद उत्पन्न करणारे ते विष. असे विष ज्या क्रोधापासून उत्पन्न झाले तो क्रोध स्थावर जंगमावर टाकला. पौराणिक कथा-देवदैत्यांनी अमृतप्राप्तीसाठी समुद्रमंथन केले तेव्हा अमृतापूर्वी तेजस्वी, चार दाढांचा, हिरव्या केसांचा, अग्निसारख्या डोळ्यांचा, भयंकर दिसणारा पुरुष उत्पन्न झाला. त्याला पाहून सर्व जग खिन्न झाले. म्हणून त्याला विष अशी संज्ञा मिळाली. त्याचे दोन भेद. स्थावर आणि जंगम. असे आणि तिसरा कृत्रिम असा, एक भेद झाला. दोषभेदाने वातिक, पैत्तिक, श्लैष्मिक असे तीन भेद झाले. त्यापैकी स्थावराचे दहा आश्रय (१) मूळ (२) पत्र (३) फळ (४) पुष्प (५) साल (६) दूध (चीक) (७) सार (८) निर्यास (९) धातु आणि (१०) कंद. क्लीतक, कण्हेर, गुंजा, सुगंध, गर्गरक, करघाट, विद्युच्छिखा, विजया ही आठ **मूळ विषे** आहेत. विषपत्रिका, अलंबा, वरदास, करंभ आणि महाकरंभ ही पाच **पत्रविषे** होत. कुमुद्वती, वेणुका, करंभ, महाकरंभ, कर्कोटक, रेणुक, खद्योतक इत्यादी बारा **फळविषे** आहेत. वेत्र, कदंब, वल्लीज इत्यादी पाच **पुष्पविषे** होत. अन्नपाचक, कर्तरीय, सौरीयक, करघाट, करंभ इत्यादी सात **त्वक्सारनिर्यासविषे** आहेत. कुमुदघ्नी, स्नुही, जालक्षीरी ही तीन **क्षीरविषे** आहेत.

फेनाश्म व हरताल ही दोन **धातुविषे** आहेत. कालकूट, वत्सनाभ, सर्षप, पालक, कर्दमक, वैराटक, मुस्तक, शृंगी इत्यादी तेरा **कन्दविषे** आहेत. या प्रमाणे पंचावन्न स्थावरविषे आहेत.

जंगम विषाची सोळा अधिष्ठाने आहेत. (१) दृष्टि (२) निःश्वास (३) दाढ, दात (४) नख (५) मूत्र (६) पुरीष (७) शुक्र (८) लाला (९) आर्तव (१०) मुख (११) चावा (१२) सरलेला वायु (१३) तुण्डास्थि (१४) पित्त (१५) शूक (१६) शव.

विषाचे सामान्य गुण-लघु, रूक्ष, आशु, विशद, व्यवायी, तीक्ष्ण, विकासी, सूक्ष्म, उष्ण, रस स्पष्ट नसलेले असते. विष **रूक्षत्वामुळे** वायूचा कोप करते. **औष्ण्यामुळे** रक्तासह पित्ताचा कोप करते, **तैक्ष्ण्यामुळे** मति गुंग करते, मर्मबंधांचा भेद करते. **सूक्ष्मत्वामुळे** शरिराच्या अत्यंत छोट्याशा सुद्धा भागात शिरते. **आशुत्वामुळे** लवकर मारते. **व्यवायित्वामुळे** जसेच्या तसे शरिरात पसरते. **विकाशित्वामुळे** दोष-धातु व मल यांचा नाश करते. **वैशद्यामुळे** सर्व देहसंचारी राहाते. **लघुत्वामुळे** चिकित्सा करण्यास कठीण असते. विषाचे पचन होत नसल्यामुळे त्याच्यापासून मलाची निष्पत्ति होत नाही व शरिरही बाहेर टाकू शकत नाही म्हणून ते दुर्हर होते. आणि म्हणून चिरक्लेशकारक होते. **विष देणाऱ्याचे लक्षण**- निरर्थक असंबद्ध व मूर्खासारखे पुष्कळ बोलतो, बोटे मोडतो, हातापायाच्या बोटांनी जमिनीवर रेघोट्या ओढतो, हसतो, कापतो, त्रस्त होतो, भलतीकडेच पाहातो, गळून गेलेला होतो, चेहरा गोरामोरा होतो, नखांनी काडी वगैरे मोडतो, दीनवाणा होऊन वारंवार केसांवरून हात फिरवितो, कोठून तरी निघून जाण्याचा मार्ग पाहतो. **विष देण्याचे प्रकार**- अन्नातून, पानातून, अंगाला लावण्याचे उटण्यातून, काढ्यातून,

स्नानाच्या पाण्यातून, लेपांतून, माळांना लावून, वस्त्रातून, आंथरूणातून, चिलखत-दागदागिन्यातून, खडावा-सिंहासनाची पायरी-हत्ती घोडे इत्यादी वरील खोगीर-अंबारी इ० ना लावून, नस्य-धूम-अंजन इत्यादी मार्फत विषप्रयोग संभवतो. **विषयुक्त अन्नाची परीक्षा**—विषयुक्त अन्न अग्नीवर टाकले तर चटचट असा आवाज येतो, तीक्ष्ण धूर बाहेर पडतो, व तो बराच वेळ तसाच राहातो, जीवजीवक पक्षी विष पाहाताच मरतो, शुक सारिका ओरडू लागतात, हंस अधिक शब्दोच्चार करतो, भृंगराज नावाचा पक्षी किलबिल शब्द करतो, माकड मलविसर्जन करतो. **विषयुक्त अन्नाचा परिणाम**—विष आमाशयात गेले तर मूर्च्छा, ओकारी, अतीसार, आध्मान, दाह, कंप, इंद्रिय-विकृति उत्पन्न करते. त्यावर तांदळाचे धूण (धुवण), दही याबरोबर गेळफळ वगैरेचे चूर्ण प्यावयास देऊन ओकारी करवावी. पक्वाशयात विष गेले तर वरील चिन्हे होऊन शिवाय दाह, तहान, इंद्रियात विकृति, पोटात गुडगुड, कृशता, पांडुरकेपणा निर्माण होतो. त्यावर विरेचनासाठी काळादाणा चूर्ण तुपातून घ्यावे. किंवा दही मध घालून दूषी विषारि अगद पाजावा. जेवणासाठी वाढलेल्या, अन्नाच्या वर येणाऱ्या वाफांनी डोळे गरगर फिरणे, शिरःशूल ते व हृदयात पीडा निर्माण होते, चुकून किंवा लोभाने अन्न खाल्यास जीभ आठळीसारखी कडक होऊन तिला रसज्ञान होत नाही टोचणी, दाह, होऊन तोंडातून कफाचा स्राव होतो. त्यावर तीनही प्रकारे शोधन करून पुराणघृत भजेयघृत व हृदयावरण करावे. शरिरात विषाने होणाऱ्या रोगांची संप्राप्ति-विषदेहात गेले की, पहिल्या प्रथम रक्ताला बिघडविते. नंतर ते कफपित्त वायूसह आशयाला बिघडविते. नंतर हृदयात जाऊन देहनाश करते. **त्याचे उपद्रव**—ज्वर, कास, वांती, श्वास, उचकी, तृष्णा, अति मूर्च्छा, व्रण, दाह, अतिसार, बस्तिपीडा, शोथ, अतिशय दुर्गंध, रक्तस्राव, अग्निमांद्य. **स्थावर विषाची लक्षणे**—सात वेग येतात. पहिल्या वेगात जिव्हा निळी काळी होते. स्तंभ, मूर्च्छा, त्रास, ग्लानि, ओकारी. **दुसऱ्या वेगात**--कंप, घाम, दाह, कंठवेदना, हृदयात कळा येतात. **तिसऱ्या वेगात**— तालुशोष, आमाशयशूल, डोळ्यांची सर्व शक्ति नष्ट होते, रंग हिरवट होऊन त्यांचे स्पर्शज्ञानही नाहीसे होते. **चवथ्या वेगात**—



पक्वाशयात गेलेले विष, उचकी, खोकला, आंत्र-कूजन, शिरोजाड्य उत्पन्न करते. **पाचव्या वेगात**—कफप्रसेक, वैवर्ण्य, पेरी फुटल्यासारखी वेदना, सर्व दोषांचा प्रकोप. **सहाव्या वेगात**— संज्ञा-नाश, जोरदार अतीसार. **सातव्या वेगात**—खांदे, पाठ, कंबर मोडल्यासारखे होऊन शक्ति नाहीशी होते व मृत्यु येतो. **विष लागलेल्या शस्त्राने झालेल्या जखमेचे स्वरूप**— शरि-राचा वर्ण बिघडतो, वारंवार अंधेरी येते, तात्काल खिन्नता येते, अवयवात मुंग्या चालतात असे भासते. श्रोणी, पृष्ठ, शिर, स्कंध, संधि यांच्या मध्ये वेदना उत्पन्न होतात; काळे नासके रक्त दंशस्थानातून येते, तहान मूर्च्छा, ज्वर, दाह, दृष्टी गढूळ होते; ओकारी, श्वास, कास निर्माण होतात; दंशस्थानाच्या कडा लाल, पिवळट होऊन ते मध्ये काळे होते; अतीशय ठणका लागतो; त्या ठिकाणचे मांस काळे होते, तेथे शूल होतो, ते लौकर पिकते आणि वारंवार ओलसर होते व नष्ट होते आणि बुळबुळीत स्रावयुक्त व्रण होतो. **जंगम विषाचे आश्रय**—दिव्य सर्पाचे दृष्टीमध्ये आणि निःश्वासात विष असते. भौमांच्या दाढात विष असते. मांजर, घोडा, वानर, सुसर, बेडुक, मासे, घोरपड, शंबूक, प्रचलाक, पाल वगैरे चार पायाचे कीटक यांच्या दाढा व नखामध्ये विष असते.

चिपिट, पिच्चिटक, कषायवासिक, सर्षपक, तोटकवर्च, कीट कौंडिन्यक यांचे मल, मूत्र विषारी असते. उंदराचे शुक्र विषारी असते. लूतांची लाळ, मूत्र, पुरीष, नख, शुक्र आर्तव विषारी आहे. विंचू, गांधीलमाशी वगैरेंच्या नांगीच्या काट्यात विष असते. चित्रशिरादि कीटकांच्या तोंडाचा दंश, दात गुदद्वारातील वायु, मूत्र आणि मलात विष असते. माशा, दुसरी विषारी माशी, जळवा यांच्या तोंडात विष असते. विष खाऊन मेलेल्या प्राण्यांची हाडे, सापाच्या मणक्याची हाडे, गांधीलमाशी व शूकतुंड, खेकडा, गोम इ० च्या तोंडात विष असते. शकुनि वगैरे माशांचे पित्त विषारी आहे. मेलेले काही कीटक व साप हे शव विष आहे.

विषावरील सामान्य चिकित्सा—**पहिल्या विष-वेगात**—ओकारी करवावी व नंतर थंड पाण्याने अभि-षेक करावा. मध तुपाबरोबर औषध द्यावे. **दुसऱ्या वेगात**— ओकारीनंतर जुलाबाचे औषध द्यावे.

**तिसऱ्या वेगात–** औषध द्यावे. नस्य अंजनही करावे. **चवथ्या वेगात** स्नेहामध्ये मिश्रण केलेले औषध पाजावे. **पाचव्या वेगात–** ज्येष्ठमधाचे काढ्यात मध घालून तो प्यावा. **सहाव्या वेगात–** अतिसाराप्रमाणेच चिकित्सा करावी. **सातव्या वेगात–** अवपीडक स्नेह द्यावा. डोक्यावर काकपद करून सरक्त मांस त्यावर ठेवावे.

**विषचिकित्सेमध्ये अपथ्य—** तिळ, मध, कुळीथ, भूक, तहान, व्यायाम, मैथुन, दिवास्वप्न हे वर्ज्य करावे. **विषरहित पुरुषलक्षण—** होत असलेले उपद्रव शांत होऊन क्षुब्ध दोष व बिघडलेले धातु पूर्ववत होऊन खाण्याची इच्छा होते. योग्य तऱ्हेने मल, मूत्र निःसरण होऊ लागते. जिव्हा स्वच्छ होते. शरिराचा वर्ण, इंद्रिय, मन, शरीर कर्म ही सर्व प्रसन्न होतात.

**वनस्पति॰ वत्सनाभः** ( चचि. १(३).२४; सुचि. ९.५५; ध. ७.१२८ )
बचनाग.
**अतिविषा** ( र. १२.१३३-३९ ) अतिविष.
**निर्यास॰ बोलम्** ( रा. ६.११६ ) बोळ.
**जलम्** ( रा. १४. ३१७ ) पाणी.

**( विषा )**–स्त्री., **वनस्पति॰ अतिविषा** ( चइ. १२.८५; ध. १.१० ) अतिविष.
**द्रवन्ती** ( ध. १.२२९ ) उंदीरकानी.

**–कण्ट**–पु., **वनस्पति॰ इङ्गुदी** ( रापरि. ८.१७ ) हिंगणबेट.

**–कण्टक**–पु., **वनस्पति॰ धन्वयासः** ( रा. ३.२५ ) धमासा.

**–कण्टकिनी**–स्त्री., **वनस्पति॰ वन्ध्यकर्कोटकी** ( ध. १.१८५ )
वांझकर्टोली.

**–कन्द**–पु., **वनस्पति॰ शुभ्रालुः** ( रापरि. ७.३३ ) पांढरा आलू.

**–कन्या**–स्त्री., **स्त्री॰ आजन्मविषसंयोगाद् विषमयी कृता कन्या, सा स्पर्शोच्छ्वासादिभिःसंगन्तारं हन्ति। तन्मस्तकस्य संस्पर्शात् पुष्पपल्लवौ म्लायतः । शय्यायां मत्कुणैर्वस्त्रे यूकाभिः स्नानवारिणा जन्तुभिर्म्रियते । एवं ज्ञात्वा तां दूरतस्त्यजेत्** ( असंसू. ८.८७-८९ ) **स्पृशन्ती सती स्वेदेन हन्ति । मैथुने गम्यमाना वृन्तात्पक्वं फलमिव मेहनं प्रशातयति** ( ड. सुक. १.४-६ )
क्रमाने चढत्या मात्रेने जन्मापासून विष खाण्याला देऊन विषाचा संस्कार केलेली स्त्री. हिच्या स्पर्शाने व श्वासोच्छ्वास वगैरेच्या संसर्गाने मृत्यु येतो. हिच्या मस्तकाच्या स्पर्शाने फुले पाने कोमेजतात. अंग स्पर्शाने अंथरुणातील ढेकूण, वस्त्रातील उवा मरतात. हिच्या स्नानाचे पाणी वाहात जाईल त्या भागातील जंतु मरतात. हे सर्व पाहूनच तिचा त्याग करावा. हिच्या अंगाच्या घामाचा स्पर्शही मृत्यु आणतो. संभोग केल्यास देठापासून फळ गळून पडावे तसे पुरुषाचे इंद्रिय गळून पडते.

**–क्रिमि**–पु., **कीट॰ विषात्मकः क्रिमिरस्य जन्म विषेण भवतीति प्रसिद्धिः** ( अहृसू. १.९ )
विषात्मक कृमि.

**–गण**–पु., **द्रव्यगण॰ साकुकमुस्तकशृङ्गिवालकसर्षपाह्वयवत्सनाभाख्यानि, एतानि स्निग्धघनगुरूणि** ( असंउ. ४८ )
विषांचा गण. विषसमूह. वर सांगितलेल्या नावाची विषे स्निग्ध, दडस व जड असतात.

**–घ्न**–वि., **विषनाशकम्** ( चसू. १.९७ )
विषघ्न, विषहर, विषनाशक.
पु., **वनस्पति॰ कदम्बः** ( रा. ९.१७४ ) कळंब.
**धन्वयासः** ( रा. ३.२६ ) धमासा.
**वनबर्बरिका** ( रा. १०.८८ ) रानतुळस.
**गण॰ विषहरो महाकषायवर्गे एको गणः** ( चसू. ४.८ )
महाकषायवर्गातील एक विषहरगण.

**( –घ्ना )**–स्त्री., **वनस्पति॰ सोमराजी** ( असंउ. ९ )
बावची.
**कटभी** ( इन्दुः, असंउ. ९ )
मालकांगोणी, विष्णुक्रांता.

**–( घ्नी )**–स्त्री., **वनस्पति॰ इन्द्रवारुणी** (रा. ३.३७१)
कवंडळ, इंद्रावण.
**वृश्चिकाली** ( रापरि. ९.७ ) लघु मेढाशिंगी.
**पुनर्नवा** ( रा.५.४०७ ) पुनर्नवा.
**हपुषा** ( रा. ४.१३ ) शेरणी.
**काष्ठकदली** ( ध. ४.७८ ) रानकेळ.
**हरिद्रा** ( ध. १.५५; सुउ. ६२.० ) हळद.
**भूधात्री** ( रा. ५.१४५ ) भुईआवळी.
**पृश्निपर्णी** ( ध.१.९१ ) पिठवण.

जीमूतकः ( रा. ३.२४४ ) देवडांगरी.
गुडूची ( असंसू. ८.७७ ) गुळवेल.
पद्मचारिणी ( असंसू. ८.७७ ) कलिहारी.
करञ्जभेदः, अङ्गारवल्ली ( रा. ९. १८१ )
द्र० 'करञ्ज' करंजप्रकार.

**–घ्नगण**–पु., द्रव्यगण० **महाकषायवर्गे षट्स्वेकः, हरिद्रामञ्जिष्ठासुवहासूक्ष्मैलापालिन्दीचन्दनकतकशिरीषसिन्धुवारश्लेष्मातका इति दशेमानि विषघ्नानि भवन्ति** ( चसू. ४.११ ) विषहर गण. हळद, मंजिष्ठा, गंधनाकुली, लहान वेलची, काळे निशोत्तर, चंदन, निवळीचे बी, शिरीष, निर्गुडी, भोकर. ही दहा द्रव्ये विषनाशकगणातील होत.

**–घ्नविधि**–पु., **कल्पोक्तो विषघ्नो विधिः** ( सुसू. ३७.५ )
विषनाशक विधि. उपचारक्रम.

**–घ्निका**–स्त्री., वनस्पति० **कटभी, श्वेताकटभी** ( रापरि. ९.३८ )
मालकांगोणी, विष्णुक्रांता.

**–चिकित्सित**–न., **अध्यायसंज्ञा०** ( चचि.२३.१ )
अध्यायाचे नाव. यात विषावरील उपचारांचे वर्णन आहे.

**–जग्ध**–वि., **विषयुक्तः, विषस्पृष्टम्, विषाक्तम्** ( असंसू. ८.१२६ )
विषयुक्त, विषमिश्र, विषाने माखलेले.

**–जुष्ट**–वि., **विषयुक्तः** (असंसू. ८.२३; सुसू.२३.७)
विषयुक्त, विषमिश्रित.

**–तिन्दु**–पु., वनस्पति० **कारस्करः** ( रापरि. ९.३५ )
कुचला.

**–तिन्दुक**–पु., वनस्पति० **कारस्करः** ( र. १२.२० )
कुचला.

**–द**–न., खनिज० **पुष्पकासीसम्** ( ध. ३.१२५ )
हिराकस.

**–(दा)**–स्त्री., वनस्पति० **बृहती** (ध. १.९३) डोरली.
**अतिविषा** ( ध. १.११ ) अतिविष.

**–दातृ**–वि., **विषप्रयोक्ता** ( सुक. १.१८-२३ )
विषदाता, विष देणारा.

**–द्रुम**–पु., वनस्पति० **कारस्करः** ( रापरि. ९.३५ )
कुचला.

**–द्वन्द्व**–न., वनस्पति० **श्वेतं, कृष्णं च वत्सनाभम्** ( र. १९.३९-४१ )
पांढरा व काळा बचनाग.

**–धूम**–पु., **विषयुक्तो धूमः, तल्लक्षणानि–श्रमार्ताः खगा भूमौ प्रपतन्ति। तत्र कासः प्रतिश्यायः शिरोरुजस्तीव्रा नयनाऽऽमयाश्च भवन्ति। लाक्षादिद्रव्यं वह्नौ निधाय धूमं विशोधयेत्** ( सुक. ३.१६-१७ )
विषाचा धूर. विषयुक्त धुराने, श्रमाने थकलेले पक्षी जमिनीवर पडतात. तसेच त्या धुराने खोकला, पडसे, डोके दुखणे, तीव्र डोळ्याचे रोग उत्पन्न होतात. या धुराचे विशोधन करण्यासाठी लाख वगैरे द्रव्ये अग्नीत घालून त्याचा धूर करावा.

**–निश्चय**–पु., **विषस्य सम्यग् ज्ञानम्** ( सुचि. १.१२४ )
विष कोणते बाधले आहे याचे ज्ञान. विष ओळखणे, विष ठरवणे.

**–पत्रिका**–स्त्री., **स्थावरविषाऽन्तर्गतपत्रविषभेदः जैपालादिबीजमध्यस्थपत्रम्** ( सुक. २.५ )
विषारी पान, जयपाळाच्या बियातील पानासारखे विषारी पान, अंकुरासारखे विषारी अंकुर.

**–पर्ण**–पु., वनस्पति० **विषवृक्षः** ( र. ३०.७० )
विषाचे झाड.

**–पादुका**–स्त्री., **सविषपादुका, तल्लक्षणानि–शोफः, स्रावः, पादयोः स्वापः, स्फोटाविर्भावश्च भवति** ( सुक. १.७२-७३ ) **चिकित्सा–अभ्यङ्गवच्चन्दनादिलेपः** ( सुक. १.५३-५४ )
विषाने माखलेल्या, विष लावलेल्या पादुका. ह्या वापरल्यास सूज, तिच्यातून स्राव होणे, पाय बधिर होणे ही लक्षणे होतात. उपचार–तेल लावतो तसा सर्वांगाला चंदनादि औषधांचा लेप देणे.

**–पिडका**–स्त्री., रोग० **पिडकाभेदः इयं विषसंज्ञिता** ( का भोजनकल्प ) द्र० **'पिडका'**
विष नावाची एक पुळी. विषारी पुळी.

**–पीत**–वि., **पीतविषः** ( असंसू. ८ )
विषपानी, विषपान केलेला.

**–पुष्प**–न., **सविषपुष्पम्** (असंसू.६.९३) विषारी फूल. **तत्र लक्षणानि–पुष्पाणां गन्धहानिः, विवर्णत्वं, म्लानता च भवेत्। जिघ्रतः शिरोदुःखं लोचने वारिपूर्णे च भवतः। चिकित्सा–तत्र बाष्पेरितं मुखाऽऽलेपे च कर्म** ( सुक. १.६५-६६ )
विषयुक्त फूल, विष लावलेले विषाचा स्पर्श झालेले

फूल. विषाच्या स्पर्शाने फुलाचा वास जातो, रंग बदलतो, ते कोमेजते, त्याचा वास घेतल्यास डोके दुखते व डोळ्यात अश्रु येतात. **उपचार**—वाफेच्या उपद्रवावरील उपचार करावे. तोंडावरही लेप घालावे.

**–पुष्पक**–पु., **वनस्पति० मदनः** ( ध. १.१६८ )
गेळफळ.

**–प्रदातृ**–वि., **जीवहरणार्थं विषं प्रददानः, विषप्रयोक्ता** ( चचि. २३.१०७ )
विषदाता, विषप्रयोग करणारा.

**–प्रशमन**–न., **आयुर्वेदाङ्गविशेषः अगदतन्त्रम्, तच्च विषनाशनम्** ( चसू. ३०.२८ )
आयुर्वेदाच्या अष्टांगापैकी एक अंग. यात विषनाशक चिकित्सा आहे. विषशास्त्र. याला अगदतंत्र म्हणतात.
**विषापहम्** ( सुसू. ४०.५ )
विषनाशक, विषघ्न, विषहर.

**–(प्रशमनी)**–स्त्री., **वनस्पति० कर्कोटकी** (ध. १.१८७)
कर्टोली.

**–भद्रा**–स्त्री., **वनस्पति० अग्निमन्थः** (ध.१.२२५(५३)
अरणी.

**–भद्रिका**–स्त्री., **वनस्पति० अग्निमन्थः** (ध. १.२२५)
अरणी.

**–भुक्त**–वि., **भक्षितविषः** ( अहसू. ७.२७-२९ )
विष भक्षण केलेला.

**–भोजन**–न., **विषयुक्तभोजनम्** ( का. विशेषकल्प )
विषयुक्त अन्नाचे भोजन, विषारी अन्नाचे भोजन.

**–मर्दनिका**–स्त्री., **वनस्पति० नाकुलिभेदः द्र० 'नाकुलि'** ( रा. ७.१५४ ) मुंगुसवेल.

**–मर्दिनी**–स्त्री., **वनस्पति० नाकुलिभेदः द्र० 'नाकुलि'** ( ध. ४.१०५ ) मुंगुसवेल.

**–मुक्त**–वि., **निर्विषत्वं प्राप्तः, तल्लक्षणानि–असौ प्रशान्तदोषप्रकृतिः सुधातुराहारकामः सममूत्रविट्कः प्रसन्नचित्तेन्द्रियचेष्टितश्च भवति** ( असंउ. ४७ )
विषप्रभाव नष्ट झालेला. त्याची लक्षणे–दोषांचा उद्रेक कमी होतो. धातु चांगले असतात, आहार घ्यावासा वाटतो. मल-मूत्र योग्य प्रमाणात मन इंद्रिये प्रसन्न व सर्व क्रिया व्यवस्थित असतात.

**–मुष्टि**–वि., **वनस्पति० कारस्करः** ( अहसू. १५.३०; र. १०.८७; रापरि. ४.३९ ) कुचला.

**–मुष्टिक**–पु., **वनस्पति० महानिम्बः** ( ध. १.३१ )
मोठा निंब, बकाणा निंब.
**राजनिम्बः** (सुसू. ३८.१८-१९) बकाणनिंब.
**कर्कोटी** ( सुसू. ३८.१८-१९ ) कर्टोली.

**–मूषिका**–स्त्री., **विषमणिः** (चचि.२३.२५२) विषमणि.
**तन्नामधेया परमौषधिः** ( इन्दुः असंउ. ४२ )
विषमूषिका नावाचे श्रेष्ठ औषध.

**–मृत**–वि., **विषेण मृतः, तल्लक्षणानि–नीलौष्ठदन्तशैथिल्यकेशपतनाङ्गभङ्गविक्षेपाः शिशिरैर्लोमहर्षाभावः, अभिघातादपि दण्डराज्यनुद्गमः, क्षतजं क्षताच्च नायाति** ( चचि. २३.३३-३४ )
विषबाधेने मेलेला. त्याची लक्षणे– ओठ निळे होतात, दात शिथिल होतात, केस गळतात, अंग गळते, अंगाला आळेपिळे दिले जातात. थंडीने सुद्धा अंगावर रोमांच उभे रहात नाहीत. शरिरावर आघाताचे सुद्धा वळ येणे इत्यादि परिणाम होत नाहीत. व्रण असेल तर त्यातून रक्त येत नाही.

**–मोहप्रशमनी**–स्त्री., **वनस्पति० बलामोटा** (ध.परि. ४.३ )
विषजन्य मोहनाशक वनस्पती.

**–लता**–स्त्री., **वनस्पति० इन्द्रवारुणी** ( रा. ३.३७३ )
कवंडळ, इन्द्रावण.

**–वर्ग**–पु., **द्र० 'विषगण'** ( र. १०.८५ )
विषांचा गण, विषांचा समूह. विषद्रव्यांचा वर्ग.

**–वल्ली**–स्त्री., **वनस्पति० इन्द्रवारुणी** ( रा. ३.३७३ )
कवंडळ.

**–वात**–पु., **सविषवातस्य शरीरसंस्पर्शः, अयमप्यागन्तुशोथोत्पादको भवति** ( चसू. १८.४ )
विषारी वात. विषयुक्त वात.
विषारी वायूच्या स्पर्शाने आगंतुस्वरूपाची सूज येते.

**–विद्रावण**–न., **घृत० इदम् अर्शोमेहकृमिपाण्डुविषनाशकम्** ( र. २९.६५-६७ )
विषनाशक तूप. हे मूळव्याध, प्रमेह, कृमी व पांडुरोगावरही उपयुक्त आहे.

**–वेग**–पु., **विषस्य धात्वन्तरगमनम् द्र० 'विष'** (चचि. २३.१८-२१; सुक. ४.४२-४५)
विषाचा एका धातूंतून दुसऱ्या धातूत प्रवेश होणे.

**–संकट**–न., **विषदोषः विषप्रकृतिकालान्नदोषदूष्यादिसङ्गमः, एतदसाध्यम्, शतस्यैकोऽत्र जीवति** ( असंउ.४० )

प्रकृति विषयुक्त होऊन काल, अन्न, दोष व धातु हे सर्वच दुष्ट होणे म्हणजे विषसंकट. हे असाध्य होय. शेकडो रोग्यांतून एखादाच जगतो.

**–संधारण**–न., **विषलताधारणम्, विषवल्लीभिः करबन्धनम्** ( असंसू. ८.५८ )
अंगावर विष धारण करणे, विषारी वेल हाताला बांधणे.

**–सेवन**–न., **विषभक्षणम्, मूलजकन्दजान्यतरविषस्य सेवनं दूष्योदरे प्रोक्तम्** ( सुचि. १४.८ )
दूष्योदरात मूलज किंवा कंदज विषाचे सेवन.

**–स्पृष्टस्थल**–न., **विषजुष्टस्थलम्, तल्लक्षणानि-गोवाजिनागोष्ट्रखरा नरा वा येन येन गात्रेण स्पृशन्ति, गात्रं च तच्छूनतां याति, दह्यते च, तथा रोमनखं विशीर्यते । तच्चिकित्सा–सर्वगन्धद्रव्ययुक्तैरनन्तां पिष्ट्वा तज्जलं विषदूषितप्रदेशे सिञ्चेत्** ( सुक. ३.१०-१२ )
विषाचा संसर्ग झालेली जागा. विषारी द्रव्ये ज्या जागेवर पसरलेली आहेत अशी जागा. **परीक्षा**— अशा जागेवर हिंडणाऱ्या गाय, बैल, घोडा, हत्ती, उंट, गाढव किंवा माणसांचे जे जे अंग लागेल तेथे सूज, दाह होऊन केस, नखे ही गळतात. **उपचार**– सर्व गंधद्रव्यांनी युक्त अनंतमूळ पाण्यात वाटून ते त्या भागावर शिंपावे.

**–हत**–वि., **विषदिग्धशस्त्रविद्धम्** ( चसू. २७.३११; सुसू. ४६.१२७ )
विषाने माखलेल्या शस्त्राने ज्याला जखम झाली आहे असा.

**–हन्**–पु., **वनस्पति० जीमूतकः** ( रा. ३.२४३ )
देवडांगरी.

**–हन्तृ**–स्त्री., **वनस्पति० शिरीषः** ( रा. ९.१८८ )
शिरस (याचे फूल फार नाजूक असते.) विषनाशक.

**–( हन्त्री )**–स्त्री., **वनस्पति० वन्ध्यकर्कोटकी** ( रा.३.२७४ ) वांझकटोली.

**विषम**–वि., **दुश्चिकित्स्यम्** ( चचि. ७.१४ )
चिकित्सा करण्यास त्रासदायक. ज्याची चिकित्सा अवघड आहे असा.
पु., **ज्वरः**, द्र० '**ज्वर**' ( सुउ. ३९.६३; चचि. ३.२९५-९६ )
पाळीचे ज्वर. धातुगत ज्वर.

**–क्रियत्व**–न., **विरुद्धोपक्रमः** ( सुनि. ६.८ )
दोषाची जी चिकित्सा धातूशी विरोधी होते ती. दोष-दूष्यांच्या परस्पर विरुद्ध चिकित्सा. दोष-दूष्यांच्या ज्या चिकित्सा एकमेकीशी विरुद्ध असतात त्या.

**–ग्राहिन्**–वि., **एकदेशग्राही ( यन्त्रविशेषः )** ( सुसू. ७.१९ )
बरोबर–व्यवस्थित पकड न घेणारे यंत्र. एखादा भाग यंत्राने पकडला जातो, एखादा पकडला जात नाही असे यंत्र.

**–ज्वर**–पु., **ज्वर० द्र० 'ज्वर'** ( चचि. ३.१६१; सुउ. ३९.६६ )
पाळीचे ज्वर, धातुगत ज्वर.
**कृशानां व्याधिमुक्तानां मिथ्याहारादिसेविनामल्पोऽपि दोषो दूष्यादेरन्यतमतो बलं लब्ध्वा सप्रत्यनीकः क्षयवृद्धिभाक् सन् विषमं ज्वरं करोति । तेषां कृशादीनां वाताद्यन्यतमो दोषो बलवान् भूत्वा स्वे स्वे काले संतापमुत्पादयन् प्रवर्तते, प्रत्यनीकबलेनाबलो भूत्वा पुनश्चैष निवर्तते । क्षीणे दोषेऽयं विषमज्वरः सूक्ष्मो भूत्वा रसादिषु धातुष्वेव लीयते । स लीनो ज्वरो लीनत्वात् कार्श्यवैवर्ण्यजाड्यादीन् आदधाति । एतादृशज्वरेषु आरम्भक्रियाकालानां वैषम्यं विद्यतेऽतस्तेषां विषमज्वर इति संज्ञा दत्ता** ( अहृनि. २.६४ ) **विषमज्वरः अनुषङ्गवानस्ति । केषांचिन्मते संततसततान्येद्युष्कतृतीयकचतुर्थका इति पञ्च विषमज्वराः** ( मधुकोश टीका. ) **संततज्वरं हित्वा सततोऽन्येद्युष्कतृतीयचतुर्थकाः चत्वार एव विषमज्वरा इति खरनादः** ( मधुकोश मा. ) **भूमिस्थं बीजं यथा काले प्ररोहति तद्वत् दोषो धातूनधिशेते, काले एव प्रकुप्यतीति विषमज्वराणां स्वकालप्रवर्तने हेतुमाह चरकः** ( चचि. ३.५३-५९ )
रोगमुक्त पण कृश अशा व्यक्तीने मिथ्या आहार आणि विहार सेवन केला तर त्याचा परिणाम थोडेसे प्रकुपित दोष दूष्य देश ऋतूंपैकी कुणाचे तरी बल प्राप्त होऊन येणे व यापैकीच कुणाचा तरी विरोध येऊन निघणे व पुन्हा येणे अशा स्वरूपाचा ज्वर उत्पन्न करतात. अशा त्या कृश वगैरेंना लक्षण व कारण युक्त वातादी दोष बलवान होऊन आपापल्या प्रकोपकाळी ज्वर उत्पन्न करतात; आणि विपरीत गुणांच्या दूष्यादींपैकी कुणाच्या तरी प्रतिकाराने अबल होऊन पुन्हा

ते शांत झाले की ज्वरही शांत होतो. दोष क्षीण असता हा ज्वर सूक्ष्म होऊन रसादी कोणत्या तरी धातूमध्ये लीन होऊन राहतो. तो लीन ज्वर कृशता, विवर्णता, जडत्व इ० निर्माण करतो. अशा प्रकारच्या ज्वरात तो येणे, राहाणे व कमी होणे ह्या काळांमध्ये अनियमितपणा असतो. म्हणून त्यांना विषम ज्वर म्हटले आहे. हे विषमज्वर पुष्कळ दिवस राहणारे असतात. काहींच्या मते संतत, सतत, अन्येद्युष्क, तृतीयक, आणि चतुर्थक असे पाच विषम ज्वर आहेत. खरनादमताने संतत ज्वर सोडून बाकीचे ज्वर विषम होत. जमिनीतील बीज योग्य वेळी जसे उगवते त्या प्रमाणे धातूमध्ये लीन असलेल्या विषम ज्वराचे दोषबीजही योग्य काळी अंकुरित होते.

**–पतित**–वि., **निम्नोन्नतप्रदेशात्पतितः** ( सुक. ५.५५ )
उंच सखल जमिनीवरून पडलेला. खाचखळगे असलेल्या जमिनीवरून पडलेला.

**–प्रजनन**–न., **विषमप्रसूतिः** ( चनि. १.२८ )
अस्वाभाविक प्रसूति. कठीण प्रसूति. ज्या प्रसूतीत काही ना काही अडचण आलेली असते ती.

**–विकृतिसमवाय**–पु., ( परिव० ) द्र० ‘ **विकृति-विषमसमवायः** ’ ( असंसू. २३.३ )
कारणानुसार विकृति न होता प्रकृतीच्या (कारणांच्या)-ही प्रतिकूल गुणांचे एकत्र येणे.

**–विज्ञान**–न., **अनुचितं ज्ञानम्** ( चशा. १.१०९ )
अयोग्य ज्ञान, विकृत ज्ञान, चुकीची माहिती.

**–शयन**–न., **अव्यवस्थितं शयनम्** ( चशा. ८.३० )
एकसारखे नसणारे अंथरुण. गाठाळ गादी. ओबड-धोबड बिछाना.

**रात्रिजागरणं दिवास्वप्नश्च** ( सुसू. १९.२० )
रात्री जागरण होणे. दिवसा झोपणे.

**–शरीरन्यास**–पु., **शरीरस्य विषमस्थितौ न्यासो नाम स्थापनम्** ( चनि. १.१९ )
खाचखळगे असलेल्यां जागेवर बसणे, निजणे, शरीर वेडेवाकडे ठेवणे. शरीर वेडेवाकडे करून बसणे, निजणे.

**–स्थित**–वि., **विषमस्थानस्थितः** ( चचि. २५.२० )
उंचसखल जागेवर बसलेला.

**विषमाग्नि**–पु., **विषमं पचतीति विषमोऽग्निः** ( चचि. १५.५० ) **क्वचिन्मन्दः, क्वचित्तीक्ष्णः, कदाचिदपचारादपि न विक्रियते इत्येवंरूपः** ( चवि. ६.१२ ) **अनियतपाकः** ( अहृसू. १.८ )
पचनाची एक स्थिति नसलेला अग्नी. योग्य आहार केव्हा पचवतो केव्हा पचवीत नाही. केव्हा तो मंद होतो, केव्हा तो तीव्र–तीक्ष्ण होतो. अपथ्य किंवा अत्याचाराने केव्हा तो बिघडतो केव्हा बिघडत नाही, या प्रमाणे पचनाविषयी अनियपितपणा असलेला अग्नी.

**विषमाङ्ग**–न., **दुःस्थितमङ्गम्** ( अहृसू. १२.४१ )
कोणत्याही क्रियेच्या वेळी सारख्या अवस्थेत न ठेवलेले अवयव.

**विषमाभिनिवेश**–पु., **अयथाभूतत्वेनाऽध्यवसानं नित्येऽनित्यमिति धारणा** ( चशा. १.९९ )
उलटज्ञान बुद्धीत असणे. विपरीत ज्ञान असणे. गैरसमज. अयोग्य ज्ञान. जे नित्य आहे ते अनित्य, जे हितकर ते अहितकर. मानणे.

**विषमारम्भविसर्गित्व**–न., **आरम्भ उत्पादो, विसर्गो मोक्षस्तौ विषमौ यस्य स विषमारम्भविसर्गी, तस्य भावो विसर्गित्वम्, इदं वातज्वरलिङ्गानामेकतमम्** ( चनि. १.२१ )
ज्याचा आरंभ म्हणजे सुरुवात आणि ऱ्हास म्हणजे नष्ट होणे ह्या दोन्ही गोष्टी अनियमित असतात असा. हे वातज्वराचे एक लक्षण.

**विषमाशन**–न., **विषमद्रव्याणामशनम्, बहुस्तोकमकाले वाऽन्नाद्यशनम्** (चनि. १.२८) **आहारमिथ्यायोगः** ( सुउ. ५०.५ )
अवेळी पुष्कळ किंवा अगदी थोडे अन्न खाणे. अधिक अन्नाच्या गरजेच्या वेळी ( कडकडून भूक असताना ) अल्प व थोड्या भुकेच्या वेळी अधिक खाणे. अयोग्य आहार.

**विषमाहार**–पु., **विषमाशनम्** ( चनि. १.२२ )
कमजास्त व अवेळी आहार घेणे.

**विषमोपचार**–पु., **प्रकृतेर्बलादीन्भावानवेक्ष्य कृत उपचारः समोपचारः, तद्विपरीतो विषमोपचारः** ( सुसू. ३१.३० )
अयोग्य उपचार. दोष, प्रकृति, बल इत्यादींचा विचार न करिता केलेला उपचार.

**विषय**–पु., **इन्द्रियार्थः, इन्द्रियविषयः, शब्दस्पर्शरूपरसगन्धा इति पञ्च विषयाः** ( सुनि. १.१० ) **हस्तादिकर्मेन्द्रियाणां विषयाः— वचनादानाऽऽनन्द-विसर्गविहरणानि** ( सुशा. १.५ )

कान, त्वचा इत्यादी इंद्रियांचे शब्द व स्पर्शादी विषय; बोलणे, घेणे, आनंद देणे, विहार करणे हे कर्मेंद्रियांचे विषय आहेत.

**विषयाभिज**–वि., **स्वोचितपुण्यदेशे जातः** ( **भेषजादिः**, ( चचि. १(४).१० )
योग्य देशात उत्पन्न झालेले. औषध, अन्न, इत्यादी अनुरूप देशात उत्पन्न झालेले.

**विषयोपलब्धि**–पु., **शब्दादीनां विषयाणामवगतिः, अनुभूतिः** ( सुशा. १.१७ ) शब्दादी विषयांची प्राप्ती, अनुभव, ज्ञान.

**विषा**–स्त्री., **वनस्पति० अतिविषा ( शुक्लकन्दा )**
( असंसू. १६.३४ ) अतिविष.
**–द्वय**–न., **वनस्पतिद्वयम्, अतिविषा प्रतिविषा च, एका शुक्लकन्दाऽन्या पीतवर्णा** ( असंसू. १२.७० ) पांढरे अतिविष व पिवळे अतिविष. असे अतिविषाचे दोन प्रकार.

**विषाख्या**–स्त्री., **वनस्पति० शुक्लकन्दा**
( अरु. अहसू. १५.४० ) अतिविष.

**विषाञ्जन**–न., **सविषनेत्राञ्जनम्, सविषाऽञ्जनेऽश्रूपदेहो दाहो वेदना दृष्टिविभ्रमोऽथवाऽऽन्ध्यम् भवेत्। तच्चिकित्सा–सद्यो घृतं पेयं समागधं तर्पणं च कर्तव्यम्** ( सुक. १.६९-७२ )
डोळ्यात घालावयाचे विषारी अंजन. विषारी काजळ. हे डोळ्यात घातल्याने डोळ्यातून अश्रु वाहतात. दाह, वेदना, दृष्टि, विभ्रम किंवा अंधत्वही येते. उपचार–ताजे तूप पिंपळी घालून प्यावे व तर्पण विधि करावा.

**विषाण**–पु., न., **शृङ्गः, वातान्वितरक्तविनिर्हरणार्थमुपयुज्यते** ( चचि. २१.६९; चशा. ८.६२ )
शिंग. वातदुष्ट रक्त काढण्याकरिता उपयोगात आणले जाते.
न., **शृङ्गाकारा मूषा** ( र. २२.२४-२९ )
शिंगाच्या आकाराची मूस.

( **विषाणी** )–स्त्री., **वनस्पति० वृश्चिकाली** ( रापरि. ९.७ )
विंचवी.
**वनस्पति० कर्कटशृङ्गी** ( ध. १.८६ ) काकडशिंगी.

**विषाणिक**–पु., **प्राणि० रोहिणः** ( धपरि.६.३४ )
एक प्राणी.

( **विषाणिका** )–स्त्री., **वनस्पति० मेषशृङ्गी**
( चसू. १.७८; चचि. १३.१६४; सुसू. ३९.४; ध. १.८७) मेढशिंगी.
**ऋषभकः** ( इन्दु. असंउ. २६ ) अष्टवर्गापैकी एक.
**सातला** ( रा. ३५९ ) शिकेकाई.
**आवर्तनिका** ( सुचि. १८.४८-४९ )
आवर्तकी, चांभार आवळी.
**आवर्तकी** ( रा. ३.२९६ ) चांभारआवळी.
**भैषज्य० कर्कटशृङ्गी** ( ध. १.८६ ) काकडशिंगी.

**विषाणिन्**–पु., **वनस्पति० शृङ्गाटकः** ( रापरि. ७.१८ )
शिंगाडा.
**ऋषभः** ( ध. १.१२५ ) अष्टवर्गापैकी एक.
**शृङ्गयुक्तः प्राणी, हरिणादिः** ( सुचि. २४.७६ )
हरिण इत्यादी शिंग असलेले प्राणी.

**विषातुर**–वि., **विषपीडितः** ( सुक. ६.२९-३१ )
विषाने पिडलेला. विषाची बाधा झालेला.

**विषाद**–पु., **मनोविकारः** ( चसू. २५.४० )
मनाचा विकार.
**दुःखम्** ( चवि. ८.११९ ) दुःख.
**वाक्कायचित्तावसादः** ( ड. सुक. ३.२१ )
काया वाचा व मन खचणे. मन विषण्ण होणे, वाणी थकणे व शरीर गळणे.
**रोग० अशीतिवातविकारेष्वेकः** ( चसू. २०.११ )
एक वातविकार.
**लक्षण० चेतसोऽनवस्थितिः खेदो वा** (चनि. १.२१)
मनाचे अस्थिरत्व, बेचैनी, खिन्नता.

( **विषादी** )–स्त्री., **वनस्पति० हंसपादी** ( रा. ५.१६६ )
राजहंस.

**विषादनी**–स्त्री., **वनस्पति० पलाशी** ( रापरि. ३.४९ )
विषादनी.

**विषाधान**–वि., **विषस्य प्रसारकम्** (चक्र. चचि. २३.४२)
विषाचा आधार, विषाचा सर्व शरीरभर प्रसार करणारे.

**विषानिल**–पु., **विषयुक्तो वायुः, तल्लक्षणानि–श्रमार्ताः खगा भूमौ पतन्ति। तेन विषेण कासप्रतिश्याय-शिरोरुजश्च नयनामयाश्च भवन्ति। तत्र लाक्षा-हरिद्रादिचूर्णमनिले विकीर्य पुनरनिलं विशोधयेत्**
( सुक. ३.१६-१७ )
विषारी वारा, विषमिश्रित वात. **विषारी वायूचे लक्षण**–श्रमाने थकलेले, पक्षी जमिनीवर कोसळतात. मानवांना खोकला, पडसे, शिरःशूल व नेत्रविकार होतात. **उपचार**— लाख, हळद वगैरे द्रव्याचे चूर्ण हवेत पसरावे.

**विषान्वय**–वि., **विषयुक्तः, विषेण अन्वयः सम्बन्धो यस्मिन् सः** ( असंसू. ६.९३ ) विषयुक्त, विषसंबद्ध.

**विषान्वयता**–स्त्री., **विषाहारमक्षिकाणां प्रसोतृत्वेन सम्बन्धो नाम तादृशमक्षिकाजनकत्वम्** ( सुसू. ४५.१४४ )
विषाहारी माशांचा जनकत्व संबंध. तशाच विषारी माशांचे जनकत्व.

**विषान्वित**–वि., **सविषः** (अहसू. २९.७३; सुक. १.५१)
विषयुक्त, विषासह.

**विषापह**–पु., **वनस्पति० मुष्ककः** ( रा. ११.२२१ )
माखा, मोखा.

( **विषापहा** )–स्त्री., **वनस्पति० इन्द्रवारुणी** ( रा. ३.३७३ ) कवंडळ.
**तिलकन्दः** ( रापरि. ७.५३ ) तिलकन्द.

**विषाभ्यङ्ग**–पु., **अभ्यञ्जनद्रव्यं तैलादि, तैः कृतोऽभ्यंगो विषान्वितः सन् पिच्छिलो घनो विवर्णो वा भवति** ( सुक. १.५१ ) **अभ्यङ्गप्रयुक्ते नाम अभ्यंगमाचरितवति नरे त्वग्दाहस्वेदपाकस्फोटाऽवदरणान्युपप्नन्ति** ( असंसू. ८.४१ )
विषयुक्त. विषारी तेल इत्यादिकांचा अभ्यंग. असे हे अभ्यंगाचे तेल इत्यादी द्रव्य विषयुक्त झाल्यास ते बुळबुळीत, घट्ट, वेगळ्याच रंगाचे बनते. व त्याचा आंगाला लावण्यासाठी उपयोग केल्यास त्वचेचा दाह, घाम येणे, आंग पिकणे, फोड उठणे, वा त्वचा फाटणे वगैरे उपद्रव होतात.

**विषाभ्यास**–पु., **विषपरिशीलनम्** ( असंसू. ८.५७ )
विषाचे (क्रमाने अधिक मात्रेने) सतत सेवन.

**विषारि**-स्त्री., **वनस्पति० करञ्जः** ( रा.९.१७८ )
करंज.
**बृहच्चञ्चुः** ( रापरि. ४.२० )
मोठा करंज.

**विषार्त**–वि., **विषपीडितः, तस्य चिकित्सा–विषवेगप्राप्तौ सत्यां मुखेन वमनार्थं मांसरसादिपानं कार्यम् । उष्णवर्ज्यो विधिः कार्यस्तत्र स्वेदो न क्रियते, परं कीटविषं शीतेनाऽभिप्रवर्धते** ( सुक. ६.२८ )
विषाने पिडलेला–त्रस्त–त्रासलेला. विषाची बाधा झालेला. त्याची चिकित्सा–विषवेग उत्पन्न झाल्यावर वांतीसाठी मांसरसाचा सुरवा वगैरे प्यावे. उष्णवर्जविधी करावा. घामासाठी उपचार करू नये; कीटविषावर मात्र शीत उपचार केले तर ते विष वाढते.

**विषाशिन्**–वि., **विषमशितुं शीलमस्येति अभ्यस्तविषो नरः, विषगरभूतभुजङ्गाऽऽखुगणजराऽकालमृत्युग्रहपाप्मानो न बाधन्ते विषसात्म्यं नरम्** ( असंउ. ४८ )
विष खाणारा. विषसेवनाचा अभ्यास असणारा, विष खाण्याची संवय असलेला. अशा माणसाला विषापासून, कृत्रिम विषापासून, भूत, सर्प, उंदीर इ०चे विष बाधत नाही; जरा, अकाल मृत्यु, ग्रहपीडा अथवा दुष्टांची बाधा होत नाही.

**विषूचिका**–स्त्री., **रोग० विसूचिका** ( र. १२.१-८ )
शूलयुक्त रेच व उलट्या दोन्ही होणारा विकार.

**विषूची**–स्त्री., **रोग० द्र० 'विसूचिका'** ( र. १२.१-८ )
पहा 'विसूचिका'

**विषोपसर्ग**-पु., **सर्पादिदंशेन विषसंबन्धः** (सुशा. ८.५)
विषाचा उपसर्ग. विषाचा संपर्क. विषाचा संबंध. विषबाधा.

**विषोपक्रम**–पु., **उपक्रम० विषचिकित्सा, मन्त्राऽरिष्टोत्कर्तननिष्पीडन–चूषणाऽग्निपरिषेकाऽवगाहरक्तमोक्षणवमनविरेकोपधानहृदयाऽऽवरणाऽञ्जननस्यधूमलेहौषधप्रशमनप्रतिसारणप्रतिविषसंज्ञासंस्थापनलेपमृतसंजीवनानि, इति चतुर्विंशतिविषोपक्रमभेदाः** (चचि. २३.३५-३७) विषोपचार. २४ आहेत.
मंत्र, दोरी बांधणे, जागा उचकटणे, दाबणे, दंशस्थानातून विषा चोखून काढणे, तेथे डाग देणे, शेकणे, व तो भाग विषनाशक द्रवात बुडवणे, शिरेतून किंवा दंशस्थानातून रक्त काढणे, वांती, रेचक, उपधान, हृदयावरण, अंजन, नस्य, धूम, लेह, विषशामक औषध सेवन, दंशावर औषध चोळणे, विषाचे प्रतियोगी दुसरे विष घेणे, शुद्धीवर आणण्याचे उपचार, मृतसंजीवन उपचार करावे.

**विषोपहत**–वि., **विषमिश्रितम्** ( चनि. १.२८ )
विष मिसळलेले. विषयुक्त.
**विषेण मृतः** ( सुशा. ५.४९ ) विषाने मेलेला.

**विषौषध** -न., **खनिजम्, विशेषतो हरितालसोमलमनःशिलाताम्राऽऽदिकमुद्भिज्जं वत्सनाभाहिफेनविषमुष्ट्यादिकं प्राणिजं वा सर्पवृश्चिकादिकानां साक्षाद्विषम्** ( र. १२.५५ )
ज्या विषाचा औषध म्हणून उपयोग केला गेला आहे असे औषध. विषाचे बनविलेले औषध. विशेषतः हरताळ, सोमल, मनशीळ, ताम्र वगैरे खनिज विषे, बचनाग, अफू, कुचला वगैरे उद्भिज्ज विषे व सर्प, विंचू वगैरे दंशाचे विष ही सर्व प्रत्यक्ष विषे होत.

**विष्कम्भ**–पु., स्तम्भः, स्थूणा ( सुसू. २३.११ ) खांब.
मूढगर्भ० ( अहृशा. २.३० ) अडलेला गर्भ,

**विष्किर**–पु., पक्षिवर्ग० विकीर्य यो धान्यादिकं भक्षयति (चसू. २७.५५; सुसू. १६.१९) लाववर्तीकवार्तीररक्तवर्त्मककक्कुभाः कपिञ्जलोपचक्राख्यचकोरकुरुबाहवो वर्तको वर्तिका, तित्तिरः क्रकरः शिखी, ताम्रचूडाख्यवरकगोनर्दगिरिवर्तिकाः सारपदेन्द्राभवरटाश्चेति विष्किराः ( असंसू. ७.६९-७१) तन्मांसगुणाः–मधुरं, कषायं, शीतं, कटु, लघु, बल्यं वृष्यं, पथ्यं, रुच्यं, त्रिदोषघ्नम् ( धपरि. २.१० ) मातीत मिसळलेले धान्यादी माती उकरून खाणारे पक्षी. लाव, वर्तीक, वार्तीर, रक्तवर्त्मक, कक्कुभ, कपिंजल, उपचक्राख्य, चकोर, कुरुबाहव, वर्तक, वर्तिका, तित्तिर, क्रकर, शिखी, ताम्रचूडा, सारपद, इंद्राभवरट हे विष्किर आहेत. त्यांचे मांस मधुर, तुरट, शीत, तिखट, हलके, बलकारक, शुक्राला हितावह, पथ्यकर, रुचकर, त्रिदोष नाशक आहे.
सर्पविशेषः, दर्वीकरः ( सुक. ४.३४ ( १ ) नाग.
–**वर्ग**–पु., पक्षिवर्ग० द्र० 'विष्किर' (अहृसू. ६.४६) पहा 'विष्किर'

**विष्टब्ध**–वि., प्रतिरुद्धः स्थिरः ( अहृसू. ८.२६ ) अडवलेला. अडथळा असलेला, रोकलेला, स्थिर.

**विष्टब्धाजीर्ण**–न., रोग० अजीर्णभेदः द्र० 'अजीर्ण' (असंसू. ११.५६)
अजीर्णाचा एक प्रकार. वातज अजीर्ण.

**विष्टम्भ**–पु., अप्रचलनरूपतयाऽवस्थानम् ( चक्र. चचि. १५.४५ )
खाली किंवा वर न जाणारे. स्थगित झालेले अन्न.
विबन्धः ( सुचि. ३४.१६ )
वाताचा रोध होणे, वात न सरणे, वाताचा अवरोध होणे.
गुडगुडाशब्दः ( ड. सुउ. ५४.१० )
गुडगुड असा आवाज.
मलाऽवरोधः ( र. १३.२४ )
मळाचा अवरोध होणे. शौचास साफ न होणे.
सवाततोदशूला मलस्याऽप्रवृत्तिः (सुसू. ४५.१५८; सुसू. ४६.२९५)
वात धरून टोचणी शूळ होतो व मळाचा अवरोध होतो अशी अवस्था.



**विष्टम्भिन्**–वि., विष्टम्भकम् विष्टम्भकारकम् ( र. ११.१२७-२८ )
अवरोधकारक. अवरोध करणारे.

( **विष्टम्भिनी** )–स्त्री., विष्टम्भकारिका (असंसू. ६.१२४) पहा 'विष्टम्भिन्'.

**विष्टरुहा**–स्त्री., वनस्पति० सुवर्णकेतकी द्र० 'केतकी' ( रापरि. १०.३ ) सोनकेवडी. पिवळी केवडी.

**विष्टिका**–स्त्री., वनस्पति० शणपुष्पी ( रा. ४.३०० ) ताग.

**विष्टन**–न., ( परिव० ) मलोत्सर्जनम् ( र. ५.१९९ ) मलाचे उत्सर्जन. मलमोचन.

**विष्ठा**–स्त्री., ( परिव० ) पुरीषमलः ( र. ५.१९९ ) मळ.

**विष्णु**–पु., देवता० ( सुशा. १.७ ) देवतेचे नाव.
–**कन्द**–पु., वनस्पति० तद्गुणाः–मधुरः, शीतो रुच्यः सन्तर्पणः पित्तघ्नो दाहशोफहरः ( रापरि. ७.४० ) एक वनस्पती. दीर्घवर्तुलाकार, मोठा, पुष्कळ पापुद्रे असलेला, पाण्यात होणारा कंद. **गुण**—मधुर थंड, रुचकर, तृप्तिकर, पित्तनाशक, आणि दाह व सूज नष्ट करणारा आहे.
–**क्रान्ता**–स्त्री., वनस्पति० तद्गुणाः–कटुस्तिक्ता कफवातघ्नी च ( ध. ४.११५ )
हिं.—शङ्कापुष्पी.
**म.—शंकावली, विष्णुक्रांता.**
ता.—विष्णुक्रान्ती.
विष्णुक्रांता. **गुण**—तिखट, कडू, कफवातनाशक.
**बलामोटा** (र. २०.६८-७६ ) बलामोटा.
–**गुप्त**–पु., वनस्पति० विष्णुकन्दः ( रापरि. ७.४० ) पहा 'विष्णुकंद'
न., चाणक्यमूलम् ( ध. ४.३५ )
चाणक्यमूळ. रेताड भूमीत होणारा मोठ्या मुळांचा कंद ( एक प्रकारचा मुळा ).
–**गुप्तक**–न., वनस्पति० चाणक्यमूलम् ( ध.४.३५ ) पहा 'विष्णुगुप्त'
–**वल्लभा**–स्त्री., वनस्पति० तुलसी ( रा. १०.७७ ) तुळस.

**विष्यन्द**–पु., स्रवणम्, स्रावः ( अहृसू. ९.७ ) स्राव, स्रवणे, पाझरणे.
पु., सर्पिःक्षीरगुडाऽन्वितमामगोधूमचूर्णं हृद्यं सुगन्धिवल्यादिगुणकरम् (सुसू. ४६.३९८)
तूप व गूळ घातलेली कणीक दुधात कालवून तयार झालेला पदार्थ. **गुण**—हृदयाला हितकर, गोड,

स्निग्ध, कफकर, जड, बलवर्धक, तृप्तिकर, वातनाशक व सुगंधी.

**घृतभृष्टतण्डुलः** ( सुसू. ४६.३९८ )
तुपात भाजलेले तांदूळ.

न., **विलयनम्** ( चसू. २८.३३ )
**स्रवणम्** ( सुचि. ४.३३ )
दोषांचा स्राव करणे. दोष द्रव धातूत मिसळणे.

**विष्यन्दनाख्यतैल**–न., तैल० **सुधासेलुत्रिवृत्प्रभृतिद्रव्यसिद्धमिदं शोधनं रोपणं च** ( असंउ. ३३ )
एका सिद्ध तेलाचे नाव. त्रिधारी निवडुंग, मेथी, निशोत्तर इ० औषधांनी सिद्ध तेल. हे व्रणशोधन व रोपण करणारे आहे.

**विष्यन्दिन्**–वि., **स्रावी, स्रुतिमान्** ( अहसू. ३०.२४ )
स्राव होणारे. स्रवणारे.

**विष्वच्**–वि., **सर्वगतः, सर्वत्र स्थितः** (चचि. २६.१११)
सर्वगत. सर्वत्र असलेले. व्यापक.

**( विष्वक् )-पथस्थ**–वि., **सर्वत्र संचारी** ( चचि. २६.१११ )
सर्वत्र संचार करणारे.

**–सेनकान्ता**–स्त्री., वनस्पति० **वाराहीकन्दः** ( ध. ४.९२ )
डुक्करकंद.
**प्रियङ्गुः** ( चसू. ४.१८ ) गव्हला.

**–सेना**–स्त्री., वनस्पति० **प्रियङ्गुः** ( सुसू. १५.४८ )
गव्हला.

**–स्थित**–वि., **सर्वत्र स्थितः** ( चसि. १.२८ )
सर्वत्र असलेला.

**विसंख्योपगत**–वि., **विपरीतसंख्यायुक्तम्** (चइ. ४.१७)
असलेल्या संख्येपेक्षा निराळ्या संख्येने युक्त पदार्थ दिसणे ( मरणचिन्ह ).

**विसंज्ञ**–वि., **विपरीतसंज्ञः** ( सुउ. ६२.१३ )
संज्ञा नाश झालेला किंवा विपरीत ज्ञान होणारा.
**विगतसम्यग्ज्ञानः** ( ड. सुक. ३.२५-२७ )
योग्य ज्ञान न होणारा.

**–ता**–स्त्री., लक्षण० **संज्ञानाशः** ( चसू. १३.७५ )
जाणीव नाहीशी होणे.

**विसंवादिन्**–वि., **असंगतार्थी** ( अहसू. २.२६ )
विसंगत बोलणारा.

**विसंहत**–वि., **विघट्टितः** ( सुनि. १६.३५ )
घट्ट नसलेला, ढिला.

**विश्लिष्टम्, स्वस्थानाच्च्युतम्** ( सुचि. ३.३९ )
स्वतःच्या जागेवरून ढळलेला, निखळलेला.

**विसरण**–न., **प्रसरणम्** ( सुचि. ५.६ ) पसरणे.

**विसर्ग**–पु., **सर्जनम्, बलादिजननम्** ( सुसू. २१.८ )
निर्माण करणे. बल इत्यादी उत्पन्न करणे.
**मलादिविसर्जनम्** ( चशा. १.२६ )
मलमूत्र विसर्जन करणे. मलमूत्रत्याग.
**ज्वरमुक्तिः** ( चचि. ३.५९-६० )
ज्वर उतरणे. ताप जाणे.

**–काल**–पु., **विसृजति जनयति सोमांशं प्राणिनां च बलमिति विसर्गः** ( चसू. ६.४ ) **शरद्हेमन्तशिशिराख्य ऋतवो विसर्गकालः** (चचि. ३.४५ )
सृष्टीत जलीय अंश निर्माण करणारा व प्राण्यांमध्ये बल निर्माण करणारा काल. शरद, हेमंत, शिशिर हे तीन ऋतु विसर्गकाल म्हणून म्हटले जातात.

**विसर्जनी**–स्त्री., शारीर० **विसृजतीति विसर्जनी, गुदस्य बाह्याभ्यन्तरवलिमध्यस्था विसर्जनीसंज्ञितगुदपेशी** ( सुनि. २.५ )
गुदाच्या तीन वळ्यांपैकी मधली वळी. मलविसर्जनाचे कार्य करणारी म्हणून तिचे नाव विसर्जनी.

**विसर्प**–पु., रोग० **बहिर्मार्गजान्तर्मार्गजश्च कोष्ठानुसारी रोगः** ( चसू. ११.४९ ) **विशेषेण सर्पतीति विसर्पः** ( चसू. १८.२३ ) **तत्संप्राप्तिः–त्वङ्मांसशोणितगताः कुपिता दोषाः सर्वाङ्गसारिणमास्थितं विस्तृतमनुन्नतमाशु शोफं कुर्वन्ति, तं सर्वतो विसरणाच्च विसर्पमाहुः** ( सुनि. १०.३ ) **तत्स्थानं–वेदिनी नाम त्वक्** ( सुशा. ४.४ ) **त्रयः, दूष्याणि दोषाः, त्वङ्मांसं रक्तं लसीकाश्च** ( चचि. २१.१५ ) **तत्संख्यासंप्राप्तिः वातजः, पित्तजः, कफजो वातपित्तजोऽग्निविसर्पः, कफवातजो ग्रन्थिविसर्पः, कफपित्तजः कर्दमविसर्पः, संनिपातजोऽभिघातजश्च** (असंनि. १३.४५) **तत्पूर्वरूपाणि - रक्तमण्डलकोत्पत्तिस्तृष्णाज्वरारतिदाहाः, स्वादुशीतोपशायित्वम्** (कासू. २५.२५) **तल्लक्षणानि–तत्र वातजानि– भ्रमदवथुपिपासानिस्तोदशूलाङ्गमर्दोद्वेष्टनकम्पज्वरतमककासास्थिसंधिभेदविश्लेषणवेपनारोचकाविपाकाश्चक्षुषोराकुलत्वमस्रागमनं पिपीलिकासंचार इव चाङ्गेषु यस्मिंश्चावकाशे विसर्पो विसर्पति सोऽवकाशः श्यावारुणाभासः श्वयथुमान् निस्तोदभेदशूलायामसंकोच-**

हर्षस्फुरणैरतिमात्रं प्रपीड्यते; पित्तजानि–ज्वरस्तृष्णा मूर्च्छा मोहश्छर्दिररोचकोऽङ्गभेदः स्वेदोऽतिमात्रमन्तर्दाहः प्रलापः शिरोरुक् चक्षुषोराकुलत्वमस्वप्नोऽरतिर्भ्रमः शीतवातवारितर्षोऽतिमात्रं, हरितहारिद्रनेत्रमूत्रवर्चस्त्वं हरितहारिद्ररूपदर्शनं च यस्मिंश्चावकाशे विसर्पोऽनुसर्पति सोऽवकाशस्ताम्रहरितहारिद्रनीलकृष्णरक्तानां वर्णानामन्यतमवर्णं पुष्यति। कफजानि–शीतकः शीतज्वरो गौरवं निद्रातन्द्राऽरोचकाः, मधुरास्यत्वमास्योपलेपो निष्ठीविका छर्दिरालस्यं स्तैमित्यमग्निनाशो दौर्बल्यं च, यस्मिंश्चाऽवकाशे विसर्पोऽनुसर्पति सोऽवकाशः श्वयथुमान्पाण्डुनातिरक्तः स्नेहसुप्तिस्तम्भगौरवैरन्वितोऽल्पवेदनः कृच्छ्रपाकैश्चिरकारिभिर्बहुलत्वगुपलेपैः स्फोटैश्च श्वेतपाण्डुभिरनुबध्यते, प्रभिन्नस्तु श्वेतं पिच्छिलं तन्तुमद्घनमनुबद्धं स्निग्धमाऽऽस्रावं स्रवति, ऊर्ध्वं च गुरुभिः स्थिरैर्जालाऽवततैः स्निग्धैर्बहुलत्वगुपलेपैर्व्रणैरनुबध्यतेऽनुषङ्गी च भवति, किंचात्र श्वेतनखनयनवदनत्वङ्मूत्रवर्चस्त्वम्

( चचि. २१.३०, ३२, ३४ )

अभिघातजविसर्पः–बाह्यहेतोः क्षतात् क्रुद्धो मारुतः सरक्तं पित्तमीरयन्कुलत्थसदृशैश्चितं स्फोटैः, शोफज्वररुजादाहाढ्यं श्यावलोहितं विसर्पं कुर्यात् ( असंनि. १३.६७-६८ ) तत्साध्याऽसाध्यत्वम्–बहिर्मार्गाऽऽश्रितं साध्यमुभयाऽऽश्रितमसाध्यमन्तराऽऽश्रितं दारुणं विसर्पं कृच्छ्रसाध्यम् विद्यात् ( चचि. २१.२४ )

तद्रिष्टलक्षणानि–कासवैवर्ण्यज्वरमूर्च्छाऽङ्गभङ्गभ्रमाऽस्यशोफहृल्लासदेहसादाऽतिसाराः

( असंशा. ११.३० ) तत्सामान्यचिकित्सा–लङ्घनोल्लेखनं तिक्तसेवनं रुधिरस्याऽवसेकश्च (चचि. २१.४३-४९) संशोधनमेव श्रेयसी चिकित्सा

( सुचि. १७.१६-१७ )

धावरे हा रोग कोष्ठानुसारी असून बहिर्मार्गज आणि अंतर्मार्गज असे याचे दोन प्रकार संभवतात. वेगाने सर्व शरीरभर पसरून उत्पन्न होणारा विकार. **संप्राप्ति**—त्वचा, मांस, रक्त, लसीका यामध्ये कुपित झालेले दोष मोठी सूज (विशेषत्वाने पसरत जाणारी) निर्माण करतात. ही सूज पसरट आणि किंचित वर उचलून आल्यासारखी असते. प्राधान्याने हिचे स्थान वेदिनी नावाची चामडी. **दोष**–वात, पित्त, कफ. **दूष्ये**—त्वचा, मांस, रक्त आणि लसीका. वात, पित्त, कफ, वातपित्त, अग्निवीसर्प, कफवात, ग्रंथिविसर्प, कफपित्त, कर्दम, सान्निपातिक, अभिघात इतके विसर्पाचे प्रकार आहेत.

**त्याचे पूर्वरूप**—लाल चट्टयांची उत्पत्ति, तहान, ज्वर, बेचैनी, दाह, गोड थंड घ्यावे असे वाटते व त्याने बरे वाटते. **लक्षणे—वातविसर्पामध्ये**—भ्रम, डोळे वगैरेंची आग, तहान, ठणका, शूल; अंगमर्द, गोळे ( वेट ) येणे, कंप, ज्वर, तमक श्वास, खोकला, अस्थिसंधिभेद, व ते ढळणे, कंप, अरुची, अपचन, भूक न लागणे, डोळे व्याकुळ होणे. रक्तस्राव, अंगावर मुंग्या फिरल्याचा भास होतो, ज्या ठिकाणी धावरे उत्पन्न होते त्या ठिकाणी काळसर तांबूस अशी सूज उत्पन्न होते. ती सूज फुटल्यासारखी वेदना, ताणल्यासारखे, आखडल्यासारखे वाटणे, टोचणी, रोमांच येणे व स्फुरण यामुळे अतिशय त्रास होतो. **पित्तविसर्पामध्ये**—ताप, तहान, मूर्च्छा, मोह, ओकारी, अरोचक, अंगभेद, अधिक घाम येणे; आत दाह उत्पन्न होतो, प्रलाप, शिरोरुक्, डोळे व्याकुळ होतात. झोप न येणे, बेचैनी, भ्रम, थंड वारा व पाणी यांची अपेक्षा फार होते. डोळे, मूत्र, पुरीष, ही हिरवट–पिवळट अशी होतात; व तसेच दृश्य दिसते. ज्या ठिकाणी धावरे उत्पन्न होते. त्या ठिकाणचे फोड व सूज यांना तांबडा, हिरवा पिवळा, निळा, कृष्णवर्ण येतो. **कफविसर्पामध्ये**—थंडी वाजणे थंडी ताप, जडत्व, निद्रा, झापड, अरुचि, तोंड गोड होणे, तोंडाला चिकटा, वांती, आळस, आंग ओलसर वाटणे, अग्निमांद्य व दुर्बलता ही लक्षणे उत्पन्न होऊन शिवाय ज्या ठिकाणी धावरे उत्पन्न होते त्या ठिकाणी सूज येते ती पांढुरकी असते व फिकट, लाल स्निग्ध, त्वचेला बधिरता, स्तंभ, जडत्व येते, वेदना कमी असतात. सूज उशीरा पिकते. याचे येणारे फोड शरिराला लपेटल्यासारखे, चिरस्थायी व उशीरा पिकणारे, धूसर पांढरे असे असतात. फुटल्यावर पांढरा बुळबुळीत तंतुयुक्त, घट्ट, सारखा वाहाणारा, स्निग्ध स्राव होतो. शिवाय हे व्रण जड, स्थिर, स्निग्ध जाळ्यांनी वेष्टिलेले, त्वचेवर त्यांचा जाड थर होतो. रोग्याचे तोंड, डोळे, नखे, त्वचा व मलमूत्र पांढरी होतात.

**आघातानें होणाऱ्या विसर्पात**— बाह्य आघाताने निर्माण झालेल्या क्षतामुळे, क्रुद्ध वायु रक्त व पित्त यांचा क्षोभ करून त्या ठिकाणी कुळथाप्रमाणे बारीक बारीक फोड निर्माण करतो. त्या ठिकाणी सूज, ज्वर, दाह निर्माण होतात. श्याव लोहित रंगाचे धावरे निर्माण होते. **साध्य-असाध्य**— बाहेर मार्गावरील धावरे साध्य आहे. उभयभागी असलेले असाध्य. अंतराश्रित दारुण असे धावरे कष्टसाध्य आहे. **अरिष्टलक्षणे**— कास, वैवर्ण्य, ज्वर, मूर्च्छा, अंगभंग, भ्रम, तोंडावर सूज, उम्हासे येणे, देह गळून जाणे, अतिसार ही होत.

**सामान्य चिकित्सा**— लंघन, वमन विरेचन, कडु औषधाचे सेवन, रक्तस्राव, ही महत्वाची चिकित्सा. संशोधन ही चिकित्सा विशेष हितावह व त्यातही रक्त स्रुतीही अधिक श्रेष्ठ होय.

**-कुष्ठ**-न., रोग० कुष्ठभेदः द्र० 'कुष्ठ' ( सुनि. ५.११ ) कुष्ठरोगाचा एक प्रकार.

**-चिकित्सित**-न., अध्यायसंज्ञा० ( चचि. २१.१ ) अध्यायाचे नाव. यात कुष्ठावरील उपचार सांगितले आहेत.

**-जित्**-पु., **पारदादियोग० योगोऽयं विसर्पनाशकः** ( र. २०.१ ) पारा इ० द्रव्यांचा हा कल्प विसर्पनाशक आहे.

**-नाडीस्तनरोगचिकित्सित**-न., अध्यायसंज्ञा० ( सुचि. १७.१ ) अध्यायाचे नाव. यात विसर्पावर, नाडी व्रणावर आणि स्तनविकारावर उपचार सांगितले आहेत.

**-नाडीस्तनरोगनिदान**-न., अध्यायसंज्ञा० ( सुनि. १०.१ ) अध्यायाचे नाव. यात वीसर्प नाडीव्रण व स्तन-रोगांची व कारणांची माहिती आहे.

**विसर्पिणी**-वि., **बहिर्निर्गता (प्रेतजिह्वा)** ( चइ. ८.१४ ) बाहेर निघालेली मरणोन्मुख व्यक्तीची ( जीभ ).
स्त्री., वनस्पति० **शङ्खिनी** ( ध. १.२५६ ) सांखवेल.

**विसर्पित**-न., **स्पर्शविषाणां जन्तूनां विसर्पितसङ्गः** ( सुसू. ४२.१०(२) ) प्रसारित झालेले, स्पर्शविषाचा देहभर पसरलेला परिणाम.

**विसारिणी**-स्त्री., वनस्पति० **माषपर्णी** ( रा. ३.१७१ ) रानउडीद.

**विसारिभाव**-पु., विप्रसरणस्वभावः (ड. सुउ. ६४.७२) पसरण्याचा स्वभाव.

**विसूचि**-स्त्री., **रोग० विसूचिका** ( अहृसू. ८.१७ ) ज्या रोगात वांती व अतिसार हे दोन्ही असतात व सुया टोचल्यासारखी पीडा होते तो अजीर्णरोग.

**विसूचिका**-स्त्री., **रोग०** ( चसू. १८.६ ) **कोष्ठाऽनुसार्यन्तर्मार्गेज आमदुष्टिजन्यच्छर्द्यतिसाराऽऽदिभिरूर्ध्वमधश्च दोषं प्रच्यावयन् रोगः** (चसू. ११.४९; चवि. २.१३ ) **तन्निरुक्तिः– यस्यामनिलोऽजीर्णेन गात्राणि सूचीभिस्तुदन्निव संतिष्ठते, सा विसूचिकेति निगद्यते ।** (सुउ. ५६.३-४) **तल्लक्षणानि–मूर्च्छाऽतिसारश्छर्दिः पिपासा शूलो भ्रम उद्वेष्टनं, जृम्भा, दाहो वैवर्ण्यं कम्पो हृद्रुजा शिरोविदारणमिव वेदनाश्च** (सुउ.५६.६) **तद्भेदाः–तत्र वातजा शूलाऽऽनाहाऽङ्गमर्दमुखशोषप्रलापकम्पमूर्च्छाभ्रमजृम्भोद्वेष्टनाऽक्षिप्रवेशशिरोहृदयाऽतिरुक्शिराऽऽकुञ्चनस्तम्भनानि करोति । पित्तजा पुनर्ज्वराऽतिसाराऽन्तर्दाहवैवर्ण्यतृष्णामदभ्रमप्रलपनानि, कफजा छर्द्यरोचकप्रसेकाङ्गसादाविपाकशीतज्वरगात्रगौरवाणि जनयति** ( अहृसू. ११.१६ ) **असाध्यलक्षणानि–श्यावा दन्ताः, श्यावा नखाः, मन्दा चेतना, श्यावौ अधरौ, छर्दितत्वं क्षीणदृष्टित्वं क्षीणसरत्वं शिथिलाऽखिलसंधित्वम्** ( सुउ. ५६.११ ) **बालेषु विसूचिकाया विशेषलक्षणानि–दाहो हृत्शूलः** (कासू. २५.२६)

विसूचिका म्हणजे पटकीचा वेदना व शूलयुक्त वांती अतिशाराचा आजार. या विकारात आमदुष्टि होऊन ओकाऱ्याव जुलाब होत जातात. त्यांची संप्राप्ति– अजीर्णाने कुपित वायु आमयुक्त होऊन सर्व शरीरभर सुया टोचल्याप्रमाणे ठणका उत्पन्न करतो म्हणून या विकाराला विसूचिका नाव आहे. त्यामध्ये मूर्च्छा, अतिसार, वांती, तहान, शूल, भ्रम, पेटके येणे, जांभया, दाह, वैवर्ण्य, कंप, हृदयपीडा, शिरोविदारणासारखी वेदना इत्यादी लक्षणे होतात. त्यापैकी **वातज विसूचिकेत**—शूल, पोटफुगी, अंगमर्द, मुखशोष, बडबड, कंप, मूर्च्छा, भ्रम, जांभया, पेटके येणे इत्यादी वातचिन्हे होतात.

**पित्तज विसूचिकेत**—ज्वर, अतिसार, अन्तर्दाह, वैवर्ण्य, तृष्णा, मद, भ्रम, प्रलाप इत्यादी चिन्हे होतात. **कफजन्य विसूचिकेत**– ओकारी, अरोचक, तोंडाला पाणी सुटणे, अंग गळणे, अपचन, शीतज्वर आणि अवयवाना जडत्व ही चिन्हे होतात. **असाध्य लक्षणे**—दात आणि नखे काळी पडणे, हालचाल मंद होणे, ओठ काळे होणे, वांती, तोंड वाकडे होणे, दृष्टी मंद होणे, स्वर क्षीण होणे, आणि सर्व सांधे शिथिल होणे. **लहान मुलांना होणाऱ्या विसूचिकेतील लक्षण**—दाह, आणि हृदयशूल ही विशेष चिन्हे होतात.

**–प्रतिषेध**–न., **अध्यायसंज्ञा०** ( सुउ. ५६.१ ) अध्यायाचे नाव. यात विसूचिकेचे उपचार सांगितले आहेत.

**विसृप्ति**–स्त्री., **विसरणम्** ( चनि. ४.८ ) पसरणे.

**विस्तर**–पु., **परिणाहो विशालता** ( र. १०.३४-३९ ) विस्तार. लांबीरुंदीने विस्तार.

**विस्तार**–पु., **परिमाण० वर्तुलाऽगारस्य व्यासः** ( चसू. १४.४६ ) **देहविस्तारः** ( चवि. ८.११७ ) **परिणाहो विशालता** ( र. १०.३४-३९ ) वाटोळ्या घराचा व्यास. विस्तार. लांबीरुंदीने विस्तार. दोन्ही हात आडवे पसरले असता होणारी देहाची लांबी. रसायने तयार करण्याच्या भट्टीची लांबी रुंदी.

**विस्तीर्ण**–वि., **विस्तृतत्वेन प्रशस्तम्** ( सुसू. ३५.४ ) पुष्कळ विस्तृत. पुष्कळ पसरलेले.

**–दृष्टि**–स्त्री., **नेत्ररोग० विस्तीर्णं मण्डलं यस्य तन्नयनम्** ( सुउ. १९.६-७ ) मोठी बाहुली असलेला डोळा.

**–भ्रू**–वि., **उक्तप्रमाणात्किञ्चिद्विस्तृततरभ्रूयुक्तः** ( सुसू. ३५.४ ) शास्त्रोक्त प्रमाणापेक्षा किंचित् अधिक विस्तृत भुवईयुक्त.

**–स्तनान्तर**–वि., **उक्ताऽङ्गुलिप्रमाणाद्विस्तीर्णस्तनाऽन्तरयुक्तः इदं दीर्घायुष्ट्वलक्षणम्** ( सुसू. ३५.४ ) दोन्ही स्तनामधील अंतर शास्त्रोक्त प्रमाणापेक्षा अधिक विस्तीर्ण असलेला ( पुरुष ) हे दीर्घायुष्याचे लक्षण आहे.

**विस्तीर्णोरस्क**–वि., **विस्तृतवक्षोयुक्तः इदं दीर्घायुलक्षणम्** ( सुसू. ३५.४ ) शास्त्रोक्त प्रमाणापेक्षा अधिक विस्तृत छाती असलेला. हे दीर्घायुष्याचे लक्षण आहे.

**विस्तृत**–वि., **विस्तीर्णः** ( सुनि. १०.३ ) विस्तारलेले.

**विस्फ**–पु., **क्षुद्ररोगः** ( र. २५.१ ) नखुर्डे, चिप्प.

**विस्फुटित**–वि., **विपुलस्फुटितम्** ( सुनि. १५.१० ) फार फुटलेले.

**विस्फुलिङ्ग**–पु., **अग्निकणः** ( सुउ. ७.३ ) विस्तवाची ठिणगी.

**विस्फुलिङ्गाभा**–वि., **विस्फुलिंगसदृशी, विस्फुलिङ्गः सूक्ष्मोऽग्निकणः स यथा तैजसोऽपि न दहति तद्वत्तैजसी दृष्टिरपि न दहति** ( सुउ. ७.३ ) विस्तवाच्या ठिणगी सारखी ( दृष्टि ). विस्फुलिंग म्हणजे सूक्ष्म अग्निकण; तो जसा तेजोभूयिष्ठ असूनही दाह करीत नाही, तशी तैजसदृष्टी सुद्धा दाह करीत नाही.

**विस्फूर्जितदेह**–वि., **आयामितमध्यशरीरः** ( सुशा. ८.८ ) मध्यशरीर ताठ केलेला.

**विस्फूर्जितपृष्ठ**–वि., **आयामितं पृष्ठं येन सः** (सुशा. ८.८) ताणलेल्या–पसरलेल्या पाठीचा.

**विस्फोट**– पु., **पित्तश्लेष्माऽधिकं कुष्ठम्** ( चचि. ७.३० ) पित्तकफात्मक कुष्ठ.

पु., **क्षुद्ररोग० मसूरिकाभ्योऽपि कष्टतरा महारुजा घनाः स्फोटाः** ( असंउ. ३६ ) **तल्लक्षणानि– विद्रुमसंनिभा अन्तर्वक्रा किणाभाश्च पिटिका** ( असंशा. ११.४५-४६ ) **ज्वरदाहः** ( र. २५.१ ) **तं विसर्पवदुपक्रमेत** ( काखिल. १४ ) देवीपेक्षाही त्रासदायक वेदना होणारे जाड फोड. लक्षणे– पोवळ्यासारखे, अंतर्वक्र घट्ट्यासारखे तसे पुळ्याच्या स्वरूपाचे फोड. यात ताप व दाह असतो. याची चिकित्सा विसर्पाप्रमाणेच करावी.

**–कुष्ठ**–न., **रोग० क्षुद्रकुष्ठभेदः द्र० 'विस्फोट'** ( चचि. ७.२५ ) कुष्ठाचा प्रकार.

**विस्फोटक**–पु., **क्षुद्ररोग० सस्फोटो रोगः** ( चचि. १२.९०; चसू. २६.१०२ ) **पित्तरक्ततः क्वचित्सर्वत्र वा देहेऽग्निदग्धनिभाः सज्वराः स्फोटा**

जायन्ते (सुनि. १३.१८) तत्र चिकित्सा–पित्तजस्य विसर्पस्य क्रियया एनं साधयेत्। मधुरौषधसिद्धेन च घृतेन रोपयेत् (सुचि. २०.७-८)

फोड. चामडी जळाल्याने होणाऱ्या फोडासारखे फोड. पित्त व रक्त दुष्टीमुळे केव्हा केव्हा सर्व देहावर विस्तवाने जळाल्याप्रमाणे, ज्वरयुक्त फोड होतात.

**उपचार**–पित्तज विसर्पाप्रमाणे उपचार करावे. मधुर औषधे घालून सिद्ध केलेले तूप व्रण भरून येण्यासाठी वापरावे.

**विस्मापन**–न., **विस्मयजननम्** (चसू. २४.५१)
**आश्चर्योत्पादनमुन्मादोपक्रमः** (चनि. ७.८)
**अद्रव्यभेषजेष्वेक उपायः** (चवि. ८.८७)
आश्चर्य निर्माण करणे, आश्चर्याकडे लक्ष्य वेधणे. प्रत्यक्ष द्रव्य न वापरता करावयाचा उन्माद वगैरे सारख्या रोगाचा उपचार.

**विस्मारण**–न., **विस्मृतिकरणम्** (चनि. ७.८)
रोगाच्या कारणाचे स्मरण येऊ न देणे, कारणांचे स्मरण न देणे. कारणांची आठवण येणार नाही असे करणे.

**विस्मृति**–स्त्री., **रोग० अपस्मारः** (र. २९.१३८-१५१)
फेफरे.

**विस्यन्दिन्**–वि., **श्लेष्मस्रावी, एतेन श्लेष्मणो जनक प्रवर्तकत्वमुक्तम्** (ड. सुसू. ४६.२९१)
कफाचा स्राव करणारे औषध इ०, द्रव्यांच्या ठिकाणी असलेला कफोत्पादक व प्रवर्तकधर्म विस्यंदिन् ह्या शब्दाने दर्शित होतो.

**विस्रंस**–पु., **स्थानाच्च्युतिः** (सुसू. १५.२६.२७)
स्थानापासून ढळणे, निखळणे.
**क्षीणता** (सुचि. ३४.११) क्षीण होणे.

**विस्रंसन**–न., **रेचनम्** (चवि. १.१८) रेच होणे.

**विस्र**–वि., **गुण० आमगन्धः** (चसू. २०.१५)
न पचलेल्या अन्नाचा वास.
**पूतिगन्धम्** (चनि. ४.४७)
कुजका वास, दुर्गंधी, माशा सारखा दुर्गंध.

**–ता**–स्त्री., **आमगन्धिता रक्तगतभूमिगुणानामन्यतमोऽयम्** (सुसू. १४.९)
कच्च्या मांसाच्या वासासारखा दुर्गंध, भूमि ह्या भूताचा रक्तात असणारा गुण.

**विस्रस्त**–वि., **शिथिलः** (सुसू. ४६.५३१)
ढिला, थलथलीत.

**विस्रावण**–न., **स्रावः** (सुचि. १.८) **रक्तमोक्षणम्** (सुक. ५.३६)
रक्तस्राव करणे.

**विस्राविता**–वि., **निःसारितपूर्वपानीया** (वापी) (ड. सुउ. ४७.५८-५९)
पहिले पाणी उपसून टाकलेली (विहीर).

**विस्राव्य**–न., **अष्टविधशस्त्रकर्मस्वेकं तच्च विस्रावणीयम्** (सुसू. ५.५)
स्राव होईल असे शस्त्रकर्म–अशी शस्त्रक्रिया.

**विहङ्ग**–पु., **मांसादो जलचरश्च पक्षी** (ड. सुउ. २७.१०)
मांसाहारी जलचर पक्षी.

**विहत**–वि., **उद्वेजितः** (सुसू. ४६.४१९)
त्रस्त उद्विग्न, झालेला.
**निरुद्धगतिः, ( वायुः )** (सुनि. १३.५)
ज्याची गति अडली आहे असा (वायु), कोंडलेला-अडलेला वायु.

**–मनस्**–वि., **प्रतिहतचित्तः** (सुशा. १०.४६)
भ्यालेला.

**–मुख**–वि., **विहतं नाम विगतरसं मुखं यस्य, सः** (चचि. १९.९)
तोंडाला रस कळत नाही असा.

**विहतार्चिस्**–वि., **ज्वालाशून्यः** (चचि. २३.१०९)
जाळ नसलेला, जाळरहित.

**विहरण**–न., **गमनम्** (सुशा. १.५) जाणे.

**विहायस्**–पु., न., **आकाशः** (सुउ. ६४.६-१३)
आकाश.

**विहार**–पु., (परिव०) **कायविहारश्चतुर्विधः– गमनचङ्क्रमणस्थानासनभेदेन** (ड. सुचि. २९.१०)
जाणे, हिंडणे, उभे रहाणे, बसणे असे शरिराचे चतुर्विध कर्म.

**–चपल**–वि., **चपलगतिः** (सुशा. ४.८९-९०)
चपळ, चंचल गतीचा.

**विहारिन्**–पु., **वनस्पति० भूकूष्माण्डः** (र. १७.२०)
भुईकोहळा.

**विह्वल**–वि., **विकलः** (सुउ. ६१.१३) व्याकूळ.

**वीचीतरङ्ग**–पु., **ऊर्मिपरम्परा** (सुचि. १३.२०-२१)
लाट. क्रमाने उठणाऱ्या लाटांची परंपरा.

**वीटिका**–स्त्री., **विशिष्टाकारं खर्परम्** (र. २५.३०-३१)
विशिष्ट आकाराचे खापर. वीट.

**वीतंस**–पु., **पक्षिबन्धनोपायजालादिः** (चसू. २९.१०)
जाळे, पक्षी इ० पकडण्यासाठी.

**वीततुष**–वि., अपनीतत्वक् **निस्तुषः** ( असंचि. १.१०१ )
साल काढलेले, टरफल काढलेले.

**वीतरोग**–वि., **नीरोगः** ( चक्र. चचि. २८.४ )
रोगमुक्त, रोग गेलेला, निरोगी.

**वीतीभाव**–पु., **अतिक्षीणत्वम्** ( चइ. ३.४ )
अतिक्षीणता. अतिअबलत्व. अतिकृशत्व.

**वीर**–पु., वनस्पति० **तण्डुलीयकः** ( रा. ५.१७५ )
तांदुळजा.
**वाराहीकन्दः** ( रा. ७.१३६ ) डुक्करकंद.
न., वनस्पति० **आरुकम्** ( ध. ५.३८ )
आरुक, आरारोट.
**उशीरम्** ( ध., ३.१४ ) काळा वाळा.
**मरिचम्** ( रा. ६.१३६ ) मिरे.
आसुत० **काञ्जिकम्** ( रा. १५.२९४ ) कांजी.
खनिज० **लोहम्** ( ध. ६.२६ ) धातु, लोखंड.

( **वीरा** )–स्त्री., वनस्पति० **क्षीरकाकोली**
( चचि.९.४३; धनि., १.१३४ )
अष्टवर्गापैकी एक, कावळी.
**वृद्धिः** ( चचि. २९.६५ ) अष्टवर्गापैकी एक.
**विदारी** ( चचि. ११.६२ ) भुइकोहळा.
**शालपर्णी** ( चक्र. चचि. ९.४५ ) सालवण.
**कटुकी** ( चक. ४.१३ ) कुटकी.
**कृष्णातिविषा**, द्र० ' **अतिविषा** ' ( चक. ४.१३; रानि. ६.८ ) अतिविष.
**बृहद्बला** ( चक. ४.१३ ) मोठा चिकणा.
**कुमारी** ( रापरि. ५.११ ) कोरफड.
**शतावरी** ( चचि. २८.१६१ ) शतावरी.
**महाशतावरी** ( रानि. ४.४४१ ) मोठी शतावरी.
**भूधात्री** ( असंचि. १०; रानि. ५.१४५ )
भुईआवळी.
**ब्राह्मी** ( रानि. ५.१४९ ) ब्राह्मी.
**काकोली** ( असंउ. ९; रानि. ३.१६६ )
अष्टवर्गापैकी एक, कावळी.
**गम्भारी** ( र. ३०.६६-६७ ) गंभारी.
**पृश्निपर्णी** ( असंचि. ५; वैशसिं. ) पिठवण.
**तालमूली** ( असंचि. ५; वैशसिं. )
ताडमूळ, तालमूली.
**आमलकी** ( असंचि. ५; वैशसिं. ) आवळी.
**एलवालुकः** ( असंचि. ५; वैशसिं) एक सुगंधी द्रव्य.
**रम्भा** ( असंचि. ५; वैशसिं. ) केळ,
**सुरामांसी** ( असंचि. ५; वैशसिं. ) सुरामांसी.
**शिंशपावृक्षः** ( असंचि. ५; वैशसिं. ) शिसव.
**भूम्यामलकी** ( असंचि. ५; वैशसिं. ) भुईआवळी.
**जटामांसी** ( असंचि. ५; वैशसिं. ) जटामांसी.
आसुत० **सुरा** ( रानि. १४.३०२ ) दारू.
लूता० **सौम्यलूता० तद्दंशलक्षणानि–अस्या दंशः पिटकाजालकाऽऽवृतो चित्रमण्डलवान्शिरोरुगन्नद्वेष-शीतज्वरकरश्च** ( असंउ. ४५ )
लूतप्रकार, एक विषारी किडा. **दंशलक्षणे**—पुळ्या, जाळ्यासारखे मंडल, शिरःशूल, अन्नद्वेष, आणि थंडीताप.

**–तर**–पु., न., वनस्पति० **उशीरम्** ( धनि. ३.१४ )
काळा वाळा.
**शरः** ( ड. सुउ. ९.२० ) दर्भ, काशगवत, वेळू.

**–तरादिगण**–पु., द्रव्यगण० **तद्द्रव्याणि–वेल्लन्तराऽरणिकबूकवृषाऽश्मभेदगोकण्टकेत्कटसहाचरबाण-काशवृक्षादनीनलकुशद्वयगुण्ठगुन्द्राभल्लूकमोरट-कुरण्टकरम्भपार्थाः, तद्गुणाः–अश्मरीशर्करामूत्र-कृच्छ्राऽऽघातरुजाहरो वातव्याधिनाशनश्च**
( अहृसू. १५.२४ ) **मूत्रविरेचनः**
( असंसू. १६.१८-१९ )
काळा वाळा इत्यादी वनस्पतींचा एक गट. **वीरतरादिगण** काळा वाळा, टहाकळ, रानमोगरी, अडुळसा, पाषाणभेद, गोखरू, ऊस, कोरांटी, निळी-कोरांटी, कासगवत, बांडगुळ, देवनळ, दोन्ही प्रकारचे दर्भ (जाड व बारीक) लव्हाळे, आणखी एक प्रकारचे दर्भ, टेटू, दुधी, मोरवेल, पिवळी कोरांटी, उतरणी, आणि ब्राह्मी हा औषधीगण अश्मरी, शर्करा, मूत्र कृच्छ्र, मूत्राघात, लघ्वीची तिडिक, नाहीशी करतो. तसेच वातव्याधिनाशक आहे. याने मूत्रविरेचन होते.

**–तरु**–पु., वनस्पति० **अर्जुनः**
( ड. सुचि. १५.४४-४५ )
अर्जुनसादडा.
**भल्लातकः** ( धनि. ३.१४३ ) भिलावा, बिब्बा.
**कोकिलाक्ष** (ड. सुचि. १५.४४-४५) तालीमखाना.
**शबरा** ( सुसू. ३८.१२-१३ ) लोध्र, रोध्र.
**बिल्वनासिका** ( ड. सुसू. ३९.७ )
बिल्वनासिका. सरकांडे गवत.
**शरः** ( ड. सुसू. ३९.७ )
लहान दर्भ, काशगवत, वेळू.

बिल्वः गीलको ( सुउ. ४०.४१ ) बेल.

**-तर्वादिगण**-पु., द्रव्यगण० ( सुसू. ३८.१२-१३ ) वीरतर्वादि ओषधांचा गट. काळा वाळा इ०

**-तर्वादिसिध्दजल**-न., क्वाथविशेषः ( सुशा. १०.२२ ) वीरतर्वादि औषधांच्या गटाने सिद्धजल-काढा.

**-द्रु**-वनस्पति० अर्जुनः ( रानि. ९.१९२ ) अर्जुनसादडा.

भल्लातकः ( र. २८.१३ ) भिलावा, बिब्बा.

**-पत्रिका**-स्त्री., वनस्पति० चञ्चुः ( रापरि. ४.१८ ) चंचु, चोचीसारखी निमुळती पाने असणारी शेतात होणारी भाजी.

**-पर्ण**-न., वनस्पति० सुरपर्णः ( रापरि. १०.५० ) सुरपर्ण, बारीक व सुगंधिपानाची वनस्पती.

**-पुष्प**-पु., वनस्पति० सिन्दूरी ( रापरि. १०.१९ ) सिन्दूरी, तांबड्या फुलांचे लाल बाणगवत.

**-रजस्**-न., खनिज० सिन्दूरम् ( रानि. १२.१६० ) शेंदुर.

**-वृक्ष**-पु., वनस्पति० बिल्वान्तरः ( रापरि. ८.३० ) बेलाचा प्रकार, बिल्वान्तर.

**-वेतस**-पु., वनस्पति० अम्लवेतसः ( धनि. २.९६ ) अम्लवेतस, चुका.

**-सेन**-न., वनस्पति० आरुकम् ( धनि. ५.३८ ) आरुक, एक वनस्पती.

**वीरक**-पु., वनस्पति० करवीरः ( रानि. १०.२ ) कण्हेर.

**वीरण**-पु., न., वनस्पति० उशीरम् ( रानि. १२.२५; चसू. ४.१२; असंसू. १५.२२ ) काळा वाळा.

तृण० ( इन्दु. असंशा. ४.२५ ) वीरण गवत, वीरणतृण.

**-मूलक**-न., वनस्पति० उशीरम् ( धनि. ३.१४ ) काळा वाळा.

**वीरल्ल**-पु., जलचरप्राणि० 'सुश्रुते' 'चिरल्लिः' 'चिल्लः' प्राणि० ( काचि बालग्रहचि. ) एक जलचर प्राणी.

**वीरानक**-न., वनस्पति० आरुकम् ( धनि. ५.३८ ) आरुक, आरारूट.

**वीरान्तक**-पु., वनस्पति० अर्जुनः ( धनि. ५.११४ ) अर्जुनसादडा.

**वीरास्य**-पु., वनस्पति० लताकरञ्जः ( रापरि. ८.२४ ) सागरगोटा,

**वीरिणीमूल**-न., वनस्पति० उशीरम् ( धनि. ३.१४ ) काळा वाळा.

**वीरुध्**-स्त्री., प्रतानयुक्तौद्भिदविशेष० लतागुल्मादिः ( चसू.१.७ १-७२ ) वेली झुडपे इत्यादी.

विस्तृतलता ( चक. १.८ ) ताण्यांनी पसरणारी वेल.

विस्तारवल्यो गुल्मिन्यश्च वीरुधः ( सुसू. १.२९ ) वीरुध म्हणजे पसरणारी ( जाळीसारखी ) झाडे.

**वीर्य**-न., गुण० शरीरे येन द्रव्यगुणेन या क्रिया क्रियते तद्वीर्यम् ( चसू. २६.७० ) नाऽवीर्यं किञ्चित्कुरुते यस्मात्सर्वा क्रिया वीर्यकृता एव । वैद्यके रसविपाक-प्रभावव्यतिरिक्ते प्रभूतकार्यकारिणि गुणे वीर्यमिति संज्ञा ( चक्र. चसू. २६.७० ) मृदुतीक्ष्णगुरु-लघुस्निग्धरूक्षोष्णशीतलमित्यष्टविधं वीर्यमिति केचित्; अन्येषां मते शीतोष्णमिति द्विविधमेव वीर्यमग्निषोमीयत्वाज्जगतः, उक्तं च नाना-ऽऽत्मकमपि द्रव्यमग्निषोमौ महाबलौ, व्यक्ता-ऽव्यक्तं जगदिव नाऽतिक्रामति जातुचित् ( अहसू. ९.१७ ) शीतमुष्णं स्निग्धं रूक्षं विशदं पिच्छिलं मृदुतीक्ष्णं चेत्यष्टविधं वीर्यम्; एतानि वीर्याणि स्वबलगुणोत्कर्षाद्रसमभिभूयाऽऽत्मकर्म कुर्वन्ति । यथा तावन्महत्पञ्चमूलं कषायतिक्ता-नुरसं वातं शमयति, उष्णवीर्यत्वात्; तथा कुलत्थः कषायः, कटुकः पलाण्डुः, स्नेहभावाच्च, मधुरश्चे-क्षुरसो वातं वर्धयति, शीतवीर्यत्वात्; कटुका पिप्पली पित्तं शमयति, मृदुशीतवीर्यत्वात्, अम्ल-माऽऽमलकं लवणं सैन्धवं च; तिक्ता काकमाची पित्तं वर्धयति उष्णवीर्यत्वात्, मधुरा मत्स्याश्च, कटुकं मूलकं श्लेष्माणं वर्धयति, स्निग्धवीर्यत्वात् अम्लं कपित्थं श्लेष्माणं शमयति, रूक्षवीर्यत्वात्, मधुरं क्षौद्रं च; तदेतन्निदर्शनमात्रमुक्तम् ( सुसू. ४०.५ ) द्रव्याणि येन गुणेन कर्माणि कुर्वन्ति तद्वीर्यम् ( चसू. २६.१३ ) 'समग्रगुण-सारेषु, शक्त्युत्कर्षविवर्तिषु व्यवहाराय मुख्यत्वाद्ब-ह्वग्रग्रहणादपि गुर्वादिष्वेवाऽष्टासु वीर्याख्याऽन्वर्थेति' एतद्धेतुचतुष्टयविपरीतत्वाद्रसाद्येषु वीर्यसंज्ञा नास्ति ( अहसू. ९.१४-१६ ) वीर्योपलब्धिः– द्रव्यस्य निपाताच्छरीरे यावदधिवासाच्च वीर्यमुपलभ्यते ( चसू. २६.७१ ) उष्णवीर्यलक्षणम्– वातकफयोः शमनं करोति, भ्रमतृड्ग्लानिस्वेददाहाऽऽशुपाकितां

च करोति । शीतवीर्यलक्षणम्- ह्लादनं जीवनं स्तम्भं-स्वेदाऽपनयनम्, रक्तपित्तयोः प्रसादं च करोति ( अहसू. ९.१८-१९ )

शरिरात द्रव्याच्या ज्या गुणाने ते कार्य करिते तो गुण म्हणजे वीर्य. रसविपाक प्रभावखेरीज पुष्कळ कार्य करणारा गुण वीर्य होय. मृदु, तीक्ष्ण, गुरु, लघु, स्निग्ध, रूक्ष, उष्ण, शीत असे आठ प्रकारचे वीर्य होय. हे एक मत. शीत आणि उष्ण असे दोनच प्रकारचे वीर्य होय असे दुसऱ्या शास्त्रज्ञांचे मत आहे. कारण अग्नि व सोम हेच महाबलवान असून व्यक्त आणि अव्यक्त अशा जगाच्या द्विविध स्थितीप्रमाणेच उष्ण व शीत ह्यांना सोडून जग नाही. शीत, उष्ण, स्निग्ध, रूक्ष, विशद, पिच्छिल, मृदु, तीक्ष्ण असे आठ प्रकारचे वीर्य सुश्रुताचार्य मानतात. मोठ्या पंच मुळाचे तुरट आणि कडु हे रस वातवर्धक असताही मोठे पंच मूळ वात-शामक होते, याचे कारण त्याचे वीर्य उष्ण आहे हेच होय. तसेच कुळीथ तुरट व कांदा तिखट असून स्निग्ध वीर्यामुळे वात शमन करतात. उसाचा रस मधुर असून शीतवीर्या-मुळे वात वाढवतो. पिंपळी तिखट असून तिचे वीर्य शीत व मृदु असल्याने पित्तशामक होते. आवळा, आंबट आणि सैंधव खारट असूनही त्याच दोन प्रकारच्या वीर्यामुळे पित्तशमन कर-तात. कावळी कडु पण उष्ण वीर्याने पित्तवर्धक आणि मासे मधुर रसात्मक असून उष्णवीर्याने पित्त वाढवतात. मुळा तिखट असता स्निग्ध वीर्याने कफ वाढवतो. कवठ आंबट असूनही रूक्ष वीर्याने कफाचे शमन करते. मध गोड असूनही कफशामक आहे. ही केवळ थोडी दिग्दर्शनापुरतीच उदाहरणे आहेत. द्रव्ये ज्या गुणांनी कार्य करतात ते त्याचे वीर्य. गुरु आदि वीस गुणात सारभूत व शक्तीचा उत्कर्ष असणारे व व्यवहारातही मुख्य म्हणून घेतले जातात. अशा ह्या आठ गुणांना वीर्य म्हटले आहे. ही चार कारणे रसादींना लागू होत नसल्याने त्यांना वीर्य म्हणता येत नाही.

**वीर्यप्राप्ति**—द्रव्य शरिरात गेल्यापासून ते शरिरात असेतो वीर्याची प्राप्ति होत असते म्हणजेच कार्य होत असते. **उष्णवीर्य लक्षण**—वातकफाचे शमन करते, भ्रम, तहान, ग्लानि, घाम, आणि पचनकार्य लौकर करते. **शीतवीर्यलक्षण**—आल्हादकारक, जीवनशक्तीला हितकर, अवष्टंभ, घाम नाहीसा करते आणि रक्त व पित्ताची शुद्धि करते.

**शक्तिः** ( सुउ. ४१.१९ ) शक्ति.

**प्रभावः** ( ड. सुचि. ३५.२५ ) प्रभाव.

**अचिन्त्यक्रियाहेतुः** ( सुसू. ४५.११ )
द्रव्याचे शरिरावर होणारे जे कार्य त्याच्या विचार कक्षेच्या बाहेर जो हेतु ( कारण ) असतो तो वीर्य.

**उपचयशक्तिलक्षणम्** ( सुसू. ३५.१३ )
शरीरपुष्टि व बळाचा दर्शक. शरीरपुष्टि व बल व्यक्त करणारे.

**आरब्धदुष्करकार्येष्वव्यावृत्तिर्मनसः** ( चवि. ४.८ )
कठीण कार्याचा आरंभ केल्यावर मन न डगमग-ण्याचा—माघार न घेण्याचा गुण. खडतर कार्यातील मनाची चिकाटी.

**—गर्भप्रतान**—पु., **वनस्पति० पटोलम्** ( धनि. १.५० ) पडवळ; कडुपडवळ.

**—वत्**—वि., **शक्तिमान् सबलः** ( सुशा. ३.१८ ) शक्तिशाली बलवान समर्थ.

**—सम—अन्योन्यानुपहतसामर्थ्यः ( द्रव्यभागः )** ( चक्र. चसि. १०.१८ )
दोन द्रव्यातील परस्पर वीर्याने पराभूत न होणारे वीर्य ( द्रव्यातील गुण. )

**वीर्याविरुद्ध**—वि., **वीर्येणाविरुद्धम्, अनुकूलम्** ( चवि. १.२४ )
वीर्याशी विरुद्ध नसणारे ते अविरुद्ध म्हणजेच अनुकूल.

**वीसर्प**—पु., रोग० विसर्पः ( चसू. २८.११ ) धावरे.

**वीसर्पागमन**—न., विसर्पोत्पत्तिः ( चनि. ५.७ )
विसर्प होणे.

**वृक**—पु., क्षुद्रव्याघ्र० **कुक्कुराऽनुकारी पशुशत्रुः** ( चक्र. चसू. २७.३५ )
हलक्या जातीचा वाघ. ( चित्ता ) कुत्र्यासारखा दिसणारा पशूंचा शत्रु. लांडगा, तरस.
**कुक्कुरसदृशः पशुः, गुहाशयेष्वेकः** ( ड. सुसू. ४६. ७२; धपरि. ६ )

कुत्र्यासारखा पशु; गुहेमध्ये राहाणाऱ्या प्राण्यांपैकी एक.

**वातश्लेष्मात्मके उन्मादे वृकस्य मूत्रपित्तशकृल्लोमनखैश्चर्मभिश्च सेकाऽञ्जनं प्रधमनं नस्यं धूमं च कारयेत्** ( चचि. ९.७४-७५ )

लांडग्याचे मूत्र, पित्त, विष्ठा, केस, नख, चामडे यांचा शेक किंवा अंजन, प्रधमन नस्य, धूम, वातकफात्मक उन्मादामध्ये करावे.

**(वृकी)**–स्त्री., वनस्पति० **पाठा** ( धनि. १.७० )
पहाडमूळ.

**–धूमक**–पु., शाक० **भूमिशिरीषः** ( चसू. २७.१०१ )
भूशिरस, शिरीष, शिरीष वृक्षाचा प्रकार.

**–पित्त**–न., **वृकस्य पित्तम्, विषहरमिदम्** ( असंसू. ८. २९ )
लांडग्याचे पित्त, चित्ता, तरस यांचे पित्त. विषनाशक आहे.

**–मुख**–न., **यन्त्रविशेषः, कुक्कुरसदृशः पशुः. क्षुद्रो वृकः, तन्मुखं यन्त्रम्** ( सुसू. ७.१० )
कुत्र्यासारखा पशु, लहान लांडगा. त्याच्या तोंडा सारखे दिसणारे एक यंत्र.

**–विष**–न., **वृकस्य विषम्, व्यालविषवत्कण्डूनिस्तोदवैवर्ण्यसुप्त्यादीनि लक्षणानि वृकविषाद्भवन्ति** ( असंउ. ४६.३६६ )
चित्ता, लांडगा, तरस यांचे विष. खाज, टोचणी, विवर्णता, स्पर्श न कळणे इ० लक्षणे लांडग्याच्या विषाने होतात.

**वृकोदरी**–स्त्री., पारदादियोग० **इयं गुटिका अशेषवातरोगमन्दाऽग्निताग्रहण्यादिनाशनी** ( र. २१.१३५-३८ )
एक गुटिका, पारदघटित एक औषधियोग. संपूर्ण वातरोग, अग्निमांद्य, ग्रहणी वगैरे नाशक.

**वृक्क**–पु., शारीर० **कुक्षिगोलकपिण्डः, मेदोवहानां स्रोतसां मूलं च** ( चवि. ५.८ ) **पञ्चदशकोष्ठाङ्गेष्वेकम्** ( चशा. ७.१०; अहसू. ६.७१ ) **शरीरे द्वौ वृक्कौ–एको वामपार्श्वस्थितो, द्वितीयो दक्षिणपार्श्वस्थितः** ( ड. सुनि. ९.१८ ) **तदुत्पत्तिः–रक्तमेदःप्रसादाद्वृक्कौ जायेते** ( सुशा. ४.३१ )
वृक्क, मूत्रपिंड, मेदोवह स्रोतसाचे मूल आहे. पंधरा कोष्ठाङ्गांपैकी एक. शरिरामध्ये दोन मूत्रपिंड आहेत. रक्तमेदप्रसादामुळे वृक्क ( मूत्रपिंड ) उत्पन्न होतात, ते उजवीकडे एक व डावीकडे एक असे दोन्ही बाजूला आहेत.

**–ज**–वि., **वृक्के जातः** ( **विद्रधिः** ) ( चसू. १७.१०१ )
वृक्काला होणारा विद्रधी. गळू.

**वृक्ष**–पु., वनस्पति० **लोध्रः** ( रानि. ६.२३८ ) रोध्र.
**कुटजः** ( सुउ. ४०.६९ ) कुडा.
**पुष्पफलवद्वृद्भिद० द्रुमः** ( सुसू. १.२९ )
फुले, फळे येणारे झाड.

**–ज**–वनस्पति० **इन्द्रयवः** ( सुउ. ४२.७१ ) इंद्रजव.

**–त्वच्**–स्त्री., **न्यग्रोधादिशीतवृक्षाणां त्वक्** ( सुचि. ३.२६ )
वड इत्यादि थंड झाडाची साल.

**–धूप**–पु., निर्यास० **सुगन्धिधूपः** द्र० ' **श्रीवेष्टक** ' ( रानि. १२.१९२ )
सुगंधी धूर होईल अशा झाडाचा डिंक.

**–पतित**–वि., **वृक्षात्पतितः** ( सुक. ५.५५ )
झाडावरून पडलेला.

**–बीज**–न., वनस्पति० **इन्द्रयवः** ( सुउ. ४२.५० )
इंद्रयव.

**–मर्कटिका**–स्त्री., **पर्णमृगविशेषः** ( रापरि. ८; पृ. २८६ )
वानर इ० पाने खाणारा पशु.

**–मार्जार**–पु., **पर्णमृगविशेषः** ( धपरि. ८ )
झाडावर रहाणारे मांजर, रानमांजर.

**–रुहा**–स्त्री., वनस्पति० **वृक्षादनी** ( चसू. ४.१२ )
बांडगुळ.
**जन्तुका** ( रा.३.१२९ ) बांडगुळ.

**–शायिक**–पु., **निर्विषसर्पविशेषः** ( असंउ. ४१ )
निर्विष सापाचा एक प्रकार.

**(–शायिका )** स्त्री., **वृक्षमर्कटिका पर्णमृगविशेषः गिली इति लोके** ( सुसू. ४६.७६ )
झाडावर राहणारी माकडी. कुणी गिली म्हणतात.

**वृक्षक**–पु., वनस्पति० **कुटजः** ( चचि. ७.९७ ) कुडा.

**–तैल**–न., **कुटजबीतैलम् अनिलकफकृमिकुष्ठादिरोगहरमिदम्** ( सुसू. ४५.११५ )
इंद्रजवाचे तेल. हे कफ, कृमि, कुष्ठ इत्यादी रोगाचा नाश करणारे आहे.

**–त्वच्**–स्त्री., **कुटजत्वक्** ( र. २२.७८ )
कुडयाची साल,

**–बीज**–न., वनस्पति० इन्द्रयवः ( सुउ. ३९.१९१ )
इंद्रजव.

**वृक्षादनी**–स्त्री., वनस्पति० मूत्रविरेचनीयगणे हिक्कानिग्रहणगणे, शुक्रजननगणे च प्रोक्तमेकं द्रव्यम् ( चसू. ४.१२, १४, १५,; सुशा. १०.६० )
तद्गुणाः–तिक्ता, कषाया, शीता, ग्राहिणी, व्रणरोपणी, वृष्या, रसायनी, कफपित्तघ्नी, श्रमनाशिनी च ( ध. ४.९७ )
हिं.—वन्दा, बन्दाल, बदाक, वादा.
**म.—वांडगुळ, कामरुख.**
गु.—वांदो.
बं.—वाँदु, परगाछा, मान्दडा.
बांडगुळ. मूत्रविरेचनगुण. हिक्कानिग्रहगण, शुक्रजनन गण या द्रव्यांपैकी एक.
त्याचे गुण—तिक्त, कषाय, शीत, ग्राहि, व्रणरोपण, करणारे, वृष्य, रसायन, कफपित्तशामक, श्रमनाश करणारे आहे.
**अशोकः** ( सुउ. ४०.४१ ) अशोक.
**वृक्षकलम्बुका** ( सुउ. ९.१८ ड. ) पारंब्या.
**कामवृक्षकः** ( ३८.१२-१३ अरु. ) रामवृक्ष.

**वृक्षादन्यादिघृत**–न., घृत० वाताभिष्यन्दे उपयुज्यते ( सुउ. ९.१८.१९ )
बांडगुळ इ० द्रव्यांनी सिद्ध केलेले तूप.

**वृक्षाम्ल**–न , वनस्पति० महाकषायवर्गे हृद्यगणे प्रोक्तम् एकं द्रव्यम् ( चसू. ४.१० ) तद्गुणाः–अम्लं, कटु, कषायमुष्णं, लघु, रूक्षम् ( चसू. २७.१५१ ) ग्राहि, रुचिकृत्, कफघ्नम् ( चसू. २७.१५१ ) वातघ्नमर्शस्तृष्णोदरहृद्रोगगुल्माऽतीसारव्रणदोषघ्नं च ( ध. २.९५ )
हिं.—विषाम्बिल, तत्तडीक.
**म.— अमसूल, कोकम्बसोल.**
गु.—कोकम.
बं.—महादा.
**अम्लकुटा, चुका, तेन्तुल.**
कोकम, अमसूल. महाकषायवर्गात, हृद्य औषधांत सांगितलेले एक द्रव्य.
त्याचे गुण—आंबट, कडु, कषाय, उष्ण, लघु, रूक्ष, ग्राहि, रुचिवर्धक, कफनाशक, वातनाशक, मूळव्याध, तृष्णा, उदर, हृद्रोग, गुल्म, अतीसार, व्रणदोषनाशक आहे.

**वृक्षाम्लफल**–न., वनस्पति० वृक्षाम्लम् (रा. ६.१४४)
कोकम, कोकंबी

**वृक्षारुहा**–स्त्री., वनस्पति० बला (रा. ४.४३२) चिकणा.

**वृक्षारुहाख्या**–स्त्री., वनस्पति० अमृतस्रवा ( रापरि. ३.४५ ) चिकण्याचा प्रकार.

**वृक्षेशय**–पु., निर्विषसर्पविशेषः ( सुक. ४.३४.(४)
झाडावर राहाणारा निर्विष सर्प.

**वृत्त**–वि., वर्तुलम् ( अरु. अहसू. १९.७१ ) **कोणरहितम्** ( हे. अहसू. २८.१८ )
वाटोळे, वर्तुळाकार, कोन नसणारे, कोनरहित.
न., **आचारः** ( सुउ. ६४.१ ड. )
आचार, वागणूक, वर्तन, शील.
पु., **वनस्पति० यावनालः, धवलयावनालः** ( रा. १६.१६८ ) द्र० **'यवनाल'**
जोंधळा, पांढरा जोंधळा.
**कूर्मः** ( र. २३.४३-४५ ) कासव.

**( वृत्ता )**–स्त्री., वर्तुला ( सुशा. ५.४० )
वाटोळ्या आकाराची.
स्त्री., **वर्तुलाकृतिः स्नायुः** ( सुशा. ५.३१ )
वाटोळा स्नायु. ( गुदाचा, बस्तीचा स्नायु. )
**वनस्पति० रेणुका** ( रा. ६.१०० )
वाटाणा, रेणुकबीज.
**निष्पावः** ( रा. १६.१७५ ) पावटा.
**प्रियङ्गुः** ( ध. ३.१६ ) गव्हला, वाघांटी.
**धामार्गवः** ( रा. ७.२८४ ) घोसाळे, दोडके.
**मांसरोहिणी** ( ध. ४.९४ ) जटामांसी.
**जम्बूः** ( रापरि. ५.९४ ) जांभूळ.
**झिञ्झिरीटा** (रापरि. ४.५३ )
झिंझुरटी, चिकणाप्रकार.

**–कर्कटी**–स्त्री., **वनस्पति० षड्भुजा** ( रा. ७.२५५ )
गोल काकडी. सहा फोडींच्या दर्शक रेषा असलेले फळ. खरबूज, साखरपेटी.

**–कोश**–पु., **वनस्पति० देवदाली** ( ध. १.१७३ )
देवडांगरी.

**( –कोशा )**–स्त्री., **वनस्पति० देवदाली** ( ध. १.१७३ )
देवडांगरी.

**–गर्भा**–वि., **वृत्तो गर्भो यस्याः सा** ( चशा. २.२४ )
पोटावरून वाटोळा आकार ज्याचा वाटतो–( स्पर्शाला ) लागतो तो गर्भ ज्या स्त्रीला आहे ती गर्भिणी.

**–गुण**–पु., वनस्पति० गुण्डः ( ध. १.३ ) वृक्षकगुंड.

**–गुण्ड**–पु., वनस्पति० गुण्डः ( रापरि. ८.६१ ) वृक्षाच्या गाठी.

**–तण्डुल**–पु., धान्य० जूर्णा ( रा. १६.१०८ ) जोंधळा.

**–पत्रा**–स्त्री., वनस्पति० पुत्रदात्री ( रापरि. ३.४७ ) पुत्रदात्री.

**–पत्रिका**–वनस्पति० बस्तान्त्री वृषगंधा ( रा. ३.२ पृ. ६८ ) बोकडी. बैलाच्या अंगासारखा वास येणारी वाटोळ्या पानांची वनस्पती.

**–पर्णी**–स्त्री., वनस्पति० पाठा ( रा. ६.९९ ) पहाडमूळ.

**–पुष्प**–पु., वनस्पति० कदम्बः ( ध. ५.१०४ ) कळंब.

**भूमिकदम्बः** ( रा. ९.१७४ ) गोरखमुंडी, मराठीचा एक प्रकार.

**वानीरः** ( रापरि. ९.१७ ) जलवेतस.

**कुब्जकः** ( रा. १०.२४८ ) काटेशेवंती.

**–( पुष्पा )**–स्त्री., वनस्पति० मल्लिका ( रा. १०.२२७ ) मोगरी.

**जम्बूः** ( रापरि. ५.२४ ) जांभूळ.

**–पुष्पक**–पु., वनस्पति० धूलिकदम्बः द्र० 'कदम्ब' ( ध. ५.१०५ ) कळंब.

**–फल**–पु., वनस्पति० मांसलफलः त्रपुसभेदः, द्र० 'त्रपुस' ( रा. ७.२७१ ) काकडीप्रकार.

**बदरम्** ( रा. ११.१५७ ) बोर.

**दाडिमः** ( रा. ११.९४ ) डाळिंब.

न., **मरिचम्** ( रा. ६.१३५ ) मिरे.

**(–फला )**–स्त्री., वनस्पति० बृहतीभेदः, वृन्ताकी द्र० 'बृहती' ( रा. ७.१२८ ) डोरलीप्रकार.

**आमलकम्** ( रा. ११.३२६ ) आवळा.

**–बीज**–पु., वनस्पति० राजमाषः ( रा. १६.१३५ ) चवळी.

**भेण्डा** ( रापरि. ४.२६ ) भेंडा. हाताच्या आकाराची, आंबट व वाटोळ्या पाळांची भाजी.

**–( बीजा )**–स्त्री., वनस्पति० आढकी ( ध. ६.९३ ) तूर.

**–बीजका**–स्त्री., वनस्पति० पाटली ( रापरि. ५.४४ ) पाटली.

**–मल्लिका**–स्त्री., वनस्पति० अर्कः ( शुक्लार्कः ) ( रा. १०.२९ ) रुई, मांदार.

**मल्लिका** (रापरि. १०.२३; रा. १०.२२७) मोगरी.

**–सौष्ठव**–न., साधुवृत्तम् आचारप्राशस्त्यम् ( चवि. ८.१४ ) सुशील, सदाचार, सच्छील, सद्वर्तन.

**वृत्ति**–स्त्री., चिकित्सा ( चचि. १८.१३८ ) रोगोपचार.

**उपचारविधानम्** ( चसू. १३.७ ) औषधोपचाराची रीति, रोगोपचाराचे तंत्र.

**स्वभावः** ( सुक. ३.२५-२७ ) स्वभाव.

**शरीरधारणम्, उपजीविका** ( सुउ. ६४.६४ ) उपजीविका, निर्वाह.

**वर्तनम्** ( असंसू. ६.३१ ) वागणे, आचार.

**–कर**–वि., निर्वाहकरम् उपजीविकावहम् ( सुसू. १.१९ ) निर्वाह करण्याचे साधन, उपजीविकेचा आधार.

**वृत्तेर्वारु**–स्त्री., वनस्पति० षड्भुजा ( रा. ७.२५५ ) खरबुजाची जात गोलकाकडी. काकडी वर्गातील एक.

**वृत्र**–पु., असुर० ( असंसू. ८.१०१ ) एक दैत्य.

**वृध्द्**–वि., स्थविरः, जरठः (चसू. २५.४०) सप्ततेरूर्ध्वम् ( सुसू. ३५.२९ ) नवत्यूर्ध्वं वृद्धः (सुचि.३५.२१) म्हातारा. सत्तरवर्षापेक्षां अधिक वयाचा. नव्वद वर्षांपेक्षा अधिक वयाचा घृद्ध. ह्या वयाच्या वृद्धाला निरूह अनुवासन बस्ती देऊ नये.

पु., **वनस्पति० वृद्धदारुः** (ध. ४.१०७) वरधारा.

**भूताधिपति०** (असंउ. ७) भूतांचा अधिपति–मुख्य.

न., **वनस्पति० शैलेयम्** ( ध. ३.७३ ) दगडफूल.

**–काश्यप**–पु., ऋषि० अयं बालौषधविषये मतविशेषमास्थितः ( कासिद्धि. ३ ) बालचिकित्सातंत्रकर्ता. बालकांच्या औषधोपचारांविषयी विशेषज्ञाता.

**–गोनस**–पु,, मण्डलिसर्पः ( सुक. ४.३४( २ ) मण्डलीजातीचा साप, घोणस.

**–जीवक**–पु., आयुर्वेदज्ञो महर्षि० काश्यपस्य शिष्यवरः रोगाणामपरिसंख्येयत्वं मन्यमानः (कासूलेहाध्याय) काश्यपऋषींचा शिष्य. रोग असंख्य आहेत ह्या मताचा शिष्य, जीवक.

–जीवकीयतन्त्र–न., काश्यपसंहिता (काकल्पाध्याय) काश्यपसंहिता.

–ज्वरांशुक–पु., पारदयोग० रसहिंगुलजेपालयुक्तः ज्वरघ्नः ( र. १२.४२ )
पारा, हिंगूळ, जेपाळघटित एक ज्वरनाशक योग.

–दारक–पु., वनस्पति० वृद्धदारुः (र. २८.४३–४७)
वरधारा.
वनस्पति० महिषवल्लिः, वेलरिका (असंउ. ४९)
महिषवल्ली.

–दारु–पु., वनस्पति० गुणाः– कटुस्तिक्तो, मधुरः (राज) उष्णः पिच्छिलो बल्यः कफवातघ्नः शोथ-कृमिरक्तमेहरक्तविकारमेहवातोदरनाशनश्च (ध. ४.१०८)
वरधारा. **गुण**—तिखट, कडु, मधुर, उष्ण, बुळबुळीत, बलकर, कफवातनाशक, सूज, कृमि, रक्तमेह, रक्तविकार, मेह, वातोदरनाशक आहे.

–दारुक–पु., वनस्पति० वृद्धदारुः ( ध. ४.१०७ )
वरधारा.

–फल–पु., वनस्पति० करञ्जः ( रा. ९.१७६ )
करंज.

–बन्ध–पु., पारदबन्ध० षड्गुणाभ्रकेण जारितः पारदः ( र. ११.८५ )
सहापट अभ्रक जिरविलेला पारा.

–रुहा–स्त्री., वनस्पति० शतावरी ( चसू. ४.१२ )
शतावरी.

–वत्स–पु., एकवर्षाऽऽत्मको वत्सः (सुचि. २६.३७)
एक वर्षाचा बालक.

**वृद्धि**–स्त्री., पु., रोग० वर्ध्म, मेदोजविकारेष्वेकः ( सुनि. १२; असंनि. ११; अहनि. ११ ) संप्राप्तिः– क्रुद्धो रुद्धगतिर्वायुः शोफशूलकरः सन् चरन् वंक्षणतो मुष्कौ प्राप्य फलकोशाऽभिवाहिनीर्धमनीः प्रपीड्य फलकोशयोः, फलकोशस्य वा वृद्धिं करोति ( असंनि. ११.२२-२३ ) संख्या सप्तविधा–वातजा, पित्तजा, कफजा, रक्तजा, मेदोजा, मूत्रजा, अन्यजा, ( असंनि. ११.२४ ) पूर्वरूपाणि–बस्तिकटिमुष्क-मेढ्रवेदना, मारुतनिग्रहः, फलकोशशोफः ( सुनि. १२.५ ) लक्षणानि– वातजवृद्धिः– वात-पूर्णदृतिस्पर्शो रूक्षोऽहेतुरुक् च; पित्तजः– वृद्धिरोगः पक्वोदुम्बरसङ्काशो दाहोष्मपाकवान्; कफजः–शीतो गुरुः, स्निग्धः, कण्डूमान्, कठिनोऽल्परुक्; रक्तजः कृष्णस्फोटाऽऽवृतः पित्तवृद्धिलिङ्गश्च; मूत्रजः– मूत्र-धारणशीलस्य मूत्रजवृद्धिर्भवति । गच्छतोऽम्भः-पूर्णदृतिवरक्षोभं याति । मूत्रकृच्छ्रम् मृदु सरुक् फलकोशयोर्वलयं च स्यात् । मेदोजः मृदुस्तालफलोपमः कफजवृद्धिलक्षणश्च ( असंनि. ११.२५.२८ ) आन्त्रजवृद्धेर्लक्षणानि संप्राप्तिश्च–वातकोपिभिराहारैः शीततोयाऽवगाहनै-र्धारणेरणविषमाऽङ्गप्रवर्तनाऽऽदिभिः क्षोभणैःचेष्टितैः कुपितो वायुर्यदा क्षुद्राऽन्त्रावयवं स्वस्थाना-द्विगुणीकृत्य, संकुचीकृत्याऽधो नयेत्तदा वंक्षणसंधि-स्थो वायुर्ग्रन्थ्याऽऽभं शोथं कुर्यात् । तत्र ग्रन्थि-रूपेण स्थित्वा कालान्तरेण फलकोषं गच्छति । तां मुष्कवृद्धिमाऽऽध्मानरुक्स्तम्भवतीमुपेक्षमाणस्य पुरुषस्य प्रपीडितः। सशब्दमूर्ध्वमुपैति, विमुक्तश्च वायुः पुनराऽऽध्मायते ( अह नि. ११.२८-३१; मधुकोष. मा. वृद्धिः )
अंडवृद्धि. अंड मोठे होणे.
मेदोजविकारांपैकी एक विकार. **संप्राप्ति**—क्रुद्ध झालेला वायु वंक्षण आणि अंडकोश यांच्या सांध्यामध्ये संचार करणाऱ्या धमनींवर आक्रमण करून दोन्ही किंवा एका फलकोशाच्या (अंड-कोश) ठिकाणी सूज आणि ठणका उत्पन्न करतो. ही वृद्धि सात प्रकारची आहे. वातज, पित्तज, कफज, रक्तज, मेदोज, मूत्रज आणि आन्त्रज. **वृद्धीची पूर्वरूपे**—बस्ती, कमर, अंडकोश, शिश्न या ठिकाणी वेदना; वायूचा अवरोध; अंडकोशाला सूज; वृद्धीची लक्षणे—**वातज वृद्धीत** वायुने भरलेला अंडकोश असतो. कारणाशिवाय ठणका सुरू होतो. **पित्तज वृद्धीत**—पिकलेल्या उंबराच्या रंगाचा अंडकोश होतो. दाह, उष्मा परिपाक असे त्याचे स्वरूप असते. **कफज-वृद्धीमध्ये**—शीतता, जडत्व, स्निग्धता, कंडू-युक्त कठिण, अल्प पीडायुक्त अंडकोशावरील सूज असते. **रक्तजवृद्धीमध्ये**—काळसर पुळ्यांनी आवृत असा अंडकोश असतो. पित्ताप्रमाणेच इतर चिन्हे असतात. **मूत्रज वृद्धीमध्ये**—पाण्याने भरलेल्या पखालीसारखा अंडकोश असतो. त्यात मूत्रकृच्छ्रत्व असते. पीडा असते. अंडकोशाला वळ्या पडतात. मूत्रवेग धारण करणाराला बहुधा हा विकार होतो. **मेदोज**

**वृद्धीमध्ये**—मृदु ताडगोळ्यासारखी अंडकोशाला सूज येते आणि कफज वृषणवृद्धी सारखी इतर चिन्हे होतात. **आंत्रज वृद्धीची संप्राप्ति व लक्षणे**—वातुळ आहार, थंड पाण्यात डुंबणे, मलमूत्रादी वेगांचा अवरोध किंवा बलात्काराने प्रवर्तन, शरिरावयवांची वेडी-वाकडी हालचाल इत्यादी करणांनी वायु कुपित होऊन लहान आतड्याचा भाग स्थानभ्रष्ट करून खाली नेतो. तेव्हा जांघेच्या सांध्यात गाठीसारखी सूज उत्पन्न होते. कालांतराने ती सूज खाली अंडकोशात उतरते, त्यामुळे अंड-कोश मोठा होतो; फुगतो, पीडा होते, ताठतो. ह्या अवस्थेतही उपचार न केल्यास ती सूज दाबल्यास आवाज करीत वर जाते व सोडल्यावर पुन्हा फुगते.

**वर्धनम्** ( चसू. २८.३३ ) वाढ, वाढणे.

**वनस्पति० ऋद्धिः** ( ध. १.१४५; सुचि. ३७.१२ ) ऋद्धि. अष्टवर्गांपैकी एक वनस्पती.

**कन्द० महाश्रावणी** ( सुसू. ३८.३५-३६; अरु. अहृसू. १५.१२ ) महामुंडी, मोठी मुंडी.

**–कर्णिका**–स्त्री., **वनस्पति० पाठा** ( रानि. ६.९८ ) पहाडमूळ.

**–कृत्**–वि., **वर्धनकारकम्** ( असंशा. ८.३६ ) वाढ करणारे, वृद्धिकारक.

**–द**–पु., **वनस्पति० गृष्टिः** ( रानि. ७.१३६ ) डुक्कर कंद.

**जीवकः** ( रानि. ५.१५५ ) अष्टवर्गांपैकी एक वनस्पती.

**–दात्री**–स्त्री., **वनस्पति० ऋद्धिः** ( रानि. ५.१८८ ) ऋद्धि, अष्टवर्गांपैकी एक.

**–पत्र**–न., **छेदनशस्त्र०** ( सुचि. १५.१६ ) **क्षुरा-ऽऽकारम्, तच्च द्विविधम्–एकमञ्चिताऽग्रं द्वितीयं प्रयताग्रं, द्वेऽपि सप्ताङ्गुलप्रमाणे** (ड. सुसू. ८.३-४) छेदन करण्याचे शस्त्र. चाकू, सुरी, वस्तरा यांच्या आकाराचे शस्त्र. ह्याचे २ प्रकार. आखुड टोकाचे व लांब टोकाचे. दोघांची लांबी ७ अंगुळे.

**–बला**–स्त्री., **वनस्पति० बला** ( रानि. ४.४३२ ) चिकणाप्रकार.

**–रोग**–पु., **रोग० वृद्धिः** ( सुनि. १२.३ ) वृषण–अण्डवृद्धि. 'वृद्धि' पहा.

**वृध्द्युपदंशश्लीपदचिकित्सित**–न., अध्यायसंज्ञा० ( सुचि. १९.५ ) अध्यायाचे नाव. यात अंडवृद्धि, उपदंश व श्लीपद यांचे उपचार वर्णिले आहेत.

**वृध्द्युपदंशश्लीपदनिदान**–न., अध्यायसंज्ञा० ( सुनि. १२.१ ) अध्यायाचे नाव. यात अंडवृद्धि, उपदंश आणि श्लीपद या रोगांची कारणे सांगितली आहेत.

**वृन्त**–न., पुष्पदण्डः ( र. ११.९९-१०१ ) फुलाचा देठ.

**प्रसवबन्धनम्** ( सुनि. ८.३ ) गर्भाचे गर्भाशयाशी असलेले बंधन. नाळ व वार.

**(वृन्ता)**-स्त्री., **वनस्पति० वृन्ताकी, बृहतीभेदः** द्र० **'बृहती'** ( धनि. १.१०१ ) वांगे.

**वृन्तक**–पु., **धान्य० शालिः** ( धनि. ६.७० ) साळ, तांदूळ.

**वृन्ताक**–पु., न., **शाक० वार्ताकी** ( र. १२.१५०.५१ ) वांगे.

( **वृन्ताकी** )–स्त्री., **वनस्पति० बृहतीभेदः** ( धनि. १.१०१ ) वांगे.

**–मूषा**–स्त्री.,**मूषा० धत्तूरपुष्पवदूर्ध्वनालवती वृन्ताका-ऽऽकारा मूषा, खर्परादिमृदुद्रव्यसत्वहरणार्थ-मेषोपयुज्यते** ( र. २.१६१-६२ ) खाली धोतऱ्याच्या फुलाच्या पोकळ देठासारखी वर वांग्याच्या आकाराची मूस. कलखापरीसारख्या मृदुद्रव्याच्या सत्वपातनाकरिता उपयुक्त आहे.

**वृन्द्**–पु., **कण्ठरोग० भेद्यरोगः** ( सुसू. २५.५-७; सुनि. १६.५६ ) **तल्लक्षणानि–वृत्तोन्नतो गल. पार्श्वगो दाहज्वरकरः शोफः** ( असंउ. २५ ) गळ्याचा एक रोग. शस्त्राने भेदन करण्यासारखा हा रोग आहे. **लक्षणे**— गळ्याच्या दोन्ही बाजूस गोल व उठावदार, सूज, दाह, ज्वर.

**वृन्दारक**–पु., **धान्य० शालिः** ( धनि. ६.६९ ) साळ, तांदूळ.

**वृश्चा**–स्त्री., **वनस्पति० अलिपत्रिका** ( र. २९.१२७ ) विंचवी.

**वृश्चिक**–पु., **विषयुक्तकीट०** ( चचि. २३.१५०; सुक. ३.५) **वृश्चिकस्य विषं तीक्ष्णमाशुकारि, तद्दंश-समये एवाऽग्निरिव दहति, आश्वेव तद्दंशव्रणादूर्ध्व-देहमारोहति पश्चात्तद्दंशव्रणमाश्रित्य तिष्ठति, ततो**

दंश आश्वेवाऽधिकवेदनायुक्तः श्याववर्णस्तोद-युक्तः स्फुटनप्रतीतियुक्तश्च भवति ( असंउ. ४३ ) वृश्चिकास्तु त्रिविधाः, मन्दमध्यमहाविषभेदेन ( सुक. ८.५६ ) गवादिशकृत्कोथजा मन्दविषा वृश्चिकास्ते रोमबहुला बहुसंध्युपेतपुच्छाः रक्ता उदरे पाण्डुरवर्णाश्च भवन्ति ( असंउ. ४३) मन्दविषा द्वादश वृश्चिकाः – कृष्णः श्यावः कर्बुरः पाण्डुवर्णो गोमूत्राऽऽभः कर्कशो मेचकः पीतो धूम्रो रोमशः शाड्वलाभो रक्तश्च ( सुक. ८.५७-६० ) मध्यविषास्त्रयः वर्णतः – रक्त- पीत- कपिलाः उदरेण धूम्राः, पुच्छदेशे पर्वत्रययुताः सर्पमूत्रो-च्चारपूत्यण्डेभ्य उद्भवन्ति ( सुक. ८,५७,५८,६१-६३ ) सर्पकोथजा वृश्चिका महाविषास्ते वर्णेन ताम्रा नानावर्णा यिचित्रवर्णा रक्तवर्णाश्च भवन्ति ( असंउ. ४३ ) सर्पादीनां मृतशरीरक्लेदाद्वृश्चिकोत्पत्तिः, सर्पादयो वृश्चिकैर्दष्टाः सद्य एव जीवितं त्यजन्ति ( असंसू. ७.२५७-५८ ) तत्र सर्पदष्टवच्चिकित्सा कार्या–वृश्चिकदंशमादौ स्वेदितं पश्चात्प्रच्छितं रजन्यादि चूर्णैर्दुष्टरक्त-प्रवर्तनार्थं प्रतिसारयेत्, सुरसाग्रजं मातुलुङ्गाऽम्ल-गोमूत्रपिष्टं लेपनार्थम्, सुखोष्णं गोमयं स्वेद-नार्थम्, पानार्थं क्षौद्रयुतं गोघृतं, तथा च बहुशर्करं क्षीरम् उपयुंजीत ( सुक. ८.६७-६९ )
विंचू. विषारी प्राणी. विंचवाचे विष तीक्ष्ण, शरीरभर लौकर पसरते. ज्या ठिकाणी दंश होतो त्या ठिकाणी भाजल्यासारखा दाह होतो. नंतर वेग सर्व शरीरभर पसरतो. व शेवटी दंशस्थानी येऊन थांबतो तेव्हा दंशाच्या वेदना वाढतात. तेथे रंग काळसर होतो, टोचणी, फुटल्यासारखी पीडा होते. विंचवाच्या विषाचे मंद, मध्य, व महाविष असे तीन प्रकार आहेत. गाईच्या सडलेल्या शेणात वगैरे निर्माण होणारे ते मंद विषाचे विंचू होत. त्यांच्या अंगावर केस असतात. पोटाचा भाग पांढुरका, लालसर असतो. त्यांच्या शेपटीला पुष्कळ पेरी असतात. मंद विषाचे बारा प्रकारचे विंचू आहेत. कृष्ण, श्याम, कर्बुर ( काबरा रंग ) पांडुवर्ण, गोमूत्राच्या रंगाचा, कर्कश, मेचक ( काजळासारखा ) पिवळा, धुरकट, केसाळ, गवती रंगाचा आणि लाल. मध्यम विषाचे विंचू लाल, पिवळे, पिंगट. धुरकट पोटाचे, शेपटीत तीन पेरी असणारे असे असतात. मेलेल्या सापाचे प्रेत कुजून निर्माण झालेले विंचू महाविषाचे असतात. त्यांचा रंग तांबडा व निरनिराळा चित्रविचित्र असतो. सापाला व इतर प्राण्यांना विंचवाने दंश केला तर साप व ते प्राणी मरतात.
**विंचवाच्या विषावर उपचार**-बहुतेक सर्पविषा-सारखे करावेत. विंचू चावलेली जागा शेकावी. नंतर त्या ठिकाणचे रक्त काढावे. हळदीच्या चूर्णाने चोळावे म्हणजे दुष्ट रक्त वाहून जाईल. तुळशीच्या मंजिऱ्या महाळुंग, अम्लवेतस गोमूत्रामध्ये वाटून दंशस्थानावर लेप करावा. गाईच्या कोमट शेणाने शेकावे. गाईचे तूप मध घालून प्यावे. बरीच साखर घालून दूध प्यावयास द्यावे.

**वृश्चिकर्णी**–स्त्री., वनस्पति० आखुकर्णी ( रापरि. ३.२१)
उंदीरकानी.

**वृश्चिका**–स्त्री., वनस्पति० तद्गुणाः–अम्ला, पिच्छिला, अन्त्रवृध्द्यादिदोषनुत् ( रापरि. ५.४० )
विछुवाघास. गुण– आंबट, बुळबुळीत आन्त्रवृद्धि वगैरे दोष नाशक.

**–विष**–न., वृश्चिकदंशविषम् ( सुक. ८. ७२-७३ )
विंचू डसल्याचे विष. विंचवाचे विष.

**वृश्चिकाली**–स्त्री., वनस्पति० तद्गुणाः–कटुस्तिक्तोष्णा, हृद्वक्त्रशुद्धिकृत्, बल्या, रक्तपित्तविबन्धारोचका-ऽपहा च ( रापरि. ९.७ )
हिं.—बर्हन्त.
**म.—खाजकोलती.**
बं.—बिचुती.
ता.—काञ्जुरी.
खाजकोलती. **गुण**—तिखट, कडु, उष्ण, हृदय-मुख शुद्धि करणारी, बलकर, रक्तपित्त, अवष्टंभ, अरोचक नाशक आहे.
**मेषशृङ्गी** ( ध. १.८७; असंचि. १७ ) मेढ शिंगी.
**चक्रा** ( इन्दु. असंउ. ९ )
चक्रा नावाची वनस्पती. चाकवत; काकडशिंगी. नागरमोथा.
**उष्ट्रधूमकः** ( इन्दुः असंउ. ९ ) मेढशिंगी.
**वृश्चिकपत्री** ( चचि. ९.४७ )
उंदीरकानी. लघुमेढशिंगी.

**वृश्चीर**–पु., वनस्पति० श्वेतपुनर्नवा (चक. चक. ४.१६; ध. १.२७४ )
पांढरा पुनर्नवा.

**वृश्चीव**-पु., वनस्पति० श्वेतपुनर्नवा ( सुउ. ३९.२०२ )
पांढरा पुनर्नवा.

**वृश्चीवाद्यरिष्ट**-पु., अरिष्ट० अयं गुल्मघ्नः ( सुउ. ४२.४६-४८ )
पुनर्नवाद्यरिष्ट. गुल्मनाशक.

**वृष**-वि., शुक्रोपचयवान् ( चक्र. चसि. १२.२८ )
शुक्रधातूचा परिपोष उत्तम असलेला.
पु., वनस्पति० आटरूषः ( सुउ. ३९.१९५ )
अडुळसा.
ऋषभः ( ध. १,१२५ )
अष्टवर्गापैकी एक वनस्पती.
कफप्रकृतिप्राणिविशेषः ( सुशा. ४.७६ )
कफप्रकृतीचा एक प्राणी.
ग्राम्यपशुविशेषः वृषभः ( धपरि. १६ ) बैल.
बिलेशयप्राणि० ग्राममार्जारः वनमार्जारो वा ( असंसू. ७.७६-७७ )
गांवमांजर किंवा बिळात राहाणारा रानमांजर.
बलीवर्दः ( चचि. ३.३०२-३ ) बैल.

**( वृषा )**-स्त्री., वनस्पति० द्रवन्ती ( रा. ५.३४६ )
उंदीरकानी.
आटरूषः ( र. १३.३ ) आडुळसा.
आखुकर्णी ( रापरि. ३.२२ ) उंदीरकानी.

**-कर्णी**-स्त्री., वनस्पति० आखुकर्णी (अहृसू. १५.३०)
उंदीरकानी.

**-गन्धाख्या**-स्त्री., वनस्पति० बस्तान्त्री ( रा. ३.२ )
बस्तांत्री, बोकडी.

**-घृत**-न., घृत० इदं कासश्वासयक्ष्मापाण्डुनाशनम् ( सुउ. ४१.४३-४४ )
एक सिद्ध घृत. खोकला, श्वास, क्षय, पांडुरोगनाशक.

**-ता**-स्त्री., वृष्यता ( अहृसू. ७.५४ )
चांगली संभोगक्षमता; शुक्रधातुबलत्व.

**-त्वकृत्**-वि., शुक्रवृद्धिकृत् ( चसि. ८.११ )
शुक्रवृद्धि करणारे, वैषयिक सामर्थ्य वाढवणारे.

**-दंश**-पु., प्राणि० बिडालः ( चचि. ३.३०२ ) ग्राममार्जारो वनमार्जारो वा ( सुसू. ४६.७८ )
मांजर, गांव मांजर वा रानमांजर.

**-ध्वाङ्क्षी**-स्त्री., वनस्पति० मुस्ता ( रा. ६.६२; ध. १.४१ ) नागरमोथा.

**-पर्णिका**-स्त्री., वनस्पति० फञ्जिपत्रिका ( चसू. ४.११ ( १५ ) फंजिका.

**-पुष्प**-न., शाक० गुणाः-कफपित्तहरं तिक्तं कटु शीतं च ( चसू. २७.९६ )
अडुळशाचे फूल. कफपित्तहर असून कडु, तिखट व शीत आहे.

**-मुष्टिका**-स्त्री., वनस्पति० ( असंसू. ७ )
वृषमुष्टिका नावाची वनस्पती.

**-मूलादितैल**-न., तैल० ( चचि. २८.१७०-७१ )
अडुळशाचे मूळ इत्यादी द्रव्यांनी सिद्ध केलेले तेल.

**-वर्चस्**-न., वृषभपुरीषम्, इदं रक्तपित्तघ्नम् ( सुउ. ४५.३१ )
बैलाचे शेण. रक्तपित्तनाशक.

**वृषक**-पु., वनस्पति० आटरूषः ( चसू. २३.१५; सुचि. ३७.१९ )
अडुळसा.
पाषाणभेदः ( असंक. ५ ) पाषाणभेद.

**-बीज**-न., शाकबीजम् ( असंचि. ३१.७८ )
सागाचे बी.

**वृषण**-पु., न., शारीर० अण्डकोशः, मुष्कः, पुंदेहे षट्पञ्चाशत्प्रत्यङ्गेष्वेकम्, संख्यातः, द्वौ वृषणौ ( चशा. ७.११ )
शुक्रवहानां स्रोतसां मूलं च ( चवि. ५.८ ) मांसरुधिरकफमेदसां सारादुत्पद्यते ( चसू. १८.३० )
वृषण. अंड. अंडकोष. पुरुषशरिरामधील एक अवयव. शुक्रवह स्रोतसाचे मूळ. पुरुषशरिरातील छपन्न प्रत्यंगातील एक. हे मांस, रक्त, कफ आणि मेद यांच्या सारभूत घटकांनी उत्पन्न होते.

**-कच्छू**-स्त्री., क्षुद्ररोग० कण्डूलस्त्वग्विकारः कफरक्तजन्यः ( सुनि. १३.५९-६० )
खाजवणारा त्वचारोग. कफ व रक्त दुष्टीने होतो. या रोगात अंडकोशावर खाज, फोड, फोडातून पाणी वहाणे अशी चिन्हे होतात.

**-नाश**-पु., मुष्कनाशः ( असंशा. २.४६ )
वृषणाचा नाश.

**वृषणाक्षेप**-पु., रोग० वृषणस्याक्षेपः, अशीतिवातविकारेष्वेकः ( चसू. २०.११ )
एक वातविकार. ऐंशी वातविकारांपैकी एक.

**वृषभ**-पु., पशु० बलीवर्दः, तन्मांसगुणाः-स्निग्धं गुरु बृंहणं बल्यं कफपित्तकरं पीनसकरं वातघ्नं कार्श्यमन्दाऽग्निनाशनं च ( ध. ६.४०५ ) बैल.

**मांसाचे गुण—** स्निग्ध, पचायला जड, पौष्टिक, बलकर, कफपित्तकर, पीनसरोग करणारे, वातनाशक, कृशता व अग्निमांद्यनाशक.

**वनस्पति० ऋषभः** ( ध. १.१२५ )
ऋषभक. अष्टवर्गापैकी एक वनस्पती.

**( वृषभी )**–स्त्री., **वनस्पति० दधिपुष्पी** ( ध. १.१५३ )
कुहिलीचा एक प्रकार.

**वृषभाक्षी**–स्त्री., **वनस्पति० इन्द्रवारुणी** (ध. १.२४८)
कवंडळ, इंद्रावण.

**वृषस्यन्ती**–वि., **रतार्थिनी ( स्त्री )** ( सुशा. २.४७ )
संभोगार्थिनी. संभोगेच्छु स्त्री.

**वृषा**–स्त्री., **वनस्पति० आखुकर्णी** ( रापरि. ३.२२ )
उंदीरकानी.
**आटरूषः** ( र. १३.३ ) अडुळसा.

**–कपि**–पु., **शङ्करः, अग्निः** ( चचि. २३.९२ )
शंकर, अग्नि.

**वृषाकर**–पु., **धान्य० माषः** ( ध. ६.९९ ) उडीद.

**वृषाणिन्**–पु., **वनस्पति० ऋषभः** ( रा. ५.१५७ )
ऋषभक, अष्टवर्गापैकी एक.

**वृष्टि**–स्त्री., **वर्षा, पर्जन्यः** ( अहृसू. ३.६ )
वृष्टि, पाऊस, पर्जन्य.

**वृष्य**–वि., **शुक्रवृद्धिकरम्** ( चसू. १.१०७ ) **पुंस्त्वकरम्** ( असंउ. ५० ) **वाजीकरम्** ( चचि. १.५ ) **यत्किञ्चित् स्निग्धं मधुरं बृंहणं गुरु मनसो हर्षणं च तत्सर्वं वृष्यम्** ( चचि. २(४).३६ )
शुक्रधातूची वाढ करणारे, वीर्य वाढवणारे, पुरुषत्व वाढविणारे. कामोत्तेजक, घोड्यासारखे संभोगसामर्थ्य निर्माण करणारे, जे द्रव्य स्निग्ध, मधुर, पुष्टिकर, पचावयाला जड व मनाला आनंद देणारे असते ते द्रव्य किंवा अशी कोणतीही गोष्ट वृष्य म्हणावी.
पु., **वनस्पति० इक्षुः** ( रा. १४.१८० ) ऊस.
न., **आमलकम्** ( ध. १.२१५ ) आवळा.

**(वृष्या)**–स्त्री., **वनस्पति० बलाभेदः, बलिका, द्र० 'बला'** ( ध. १.२८६ ) चिकणाप्रकार.
**भूधात्री** ( रा. ५.१४५ ) भुईआवळी.

**–कन्दा**–स्त्री., **वनस्पति० विदारी** ( ध. १.१४७ )
भुईकोहळा.

**–गन्धा**–स्त्री., **वनस्पति० बलाभेदो बलिका, द्र० 'बला'** ( ध. १.२८६ ) चिकणाप्रकार.



**–गन्धिका**–स्त्री., **वनस्पति० बलाभेदो बलिका, द्र० 'बला'** ( ध. १.२८६ ) चिकणाप्रकार.

**–योग**–पु., **वाजीकरयोगः** ( अहृसू. ४.२७ )
वीर्यवर्धक योग.

**–वल्लिका**–स्त्री., **वनस्पति० विदारी** ( ध. १.१४७ )
भुईकोहळा.

**–वल्ली**–स्त्री., **वनस्पति० विदारी** ( ध. १.१४७ )
भुईकोहळा.

**वेक्क**–पु., **ग्राम्यवर्गे डल्हणेन निर्दिष्टः प्राणिविशेषः** ( ड. सुसू. ४६.८५ )
एक ग्राम्य प्राणी.

**वेग**–पु., **प्रवृत्त्युन्मुखत्वम्** ( चसू. ७.३ ) **गतिदायको गुणः** ( सुनि. १.८७ )
गति निर्माण करणारा गुण. गति निर्माण होणे. मल मूत्रादिकांच्या उत्सर्जनाची निर्माण झालेली प्रवृत्ति.
**ज्वरादीनामाऽऽविर्भावः, संचारः** ( चचि. ३.७० )
ज्वरादि रोग प्रगट होणे. संचार.
**शरीरगतस्य वातादेर्गतिः** ( असंनि. १५.३१ )
शरिरातील वातादिदोषांची गती.
**शरीरे रसायनौषधिपाकसमये जायमानं दाहमूर्च्छाऽऽक्षेपादिकम्** ( र. १२.७९-८९ )
शरिरात रसायन–औषध घेतल्यानंतर त्याचे पचन होताना होणारे दाह, मूर्च्छा, आचके इत्यादी विकार.

**–धारण**–न., **गतिविरोधः तच्चानारोग्यकराणां श्रेष्ठम्** ( असंसू. ५.२६ )
मलमूत्रोत्सर्जनाची संवेदना निर्माण झाल्यावर त्या वेगाच्या गतीचे नियंत्रण करणे, त्या गतीला अडवणे, त्या प्रवृत्तीला विरोध करणे, वेग धरणे.

**–नामन्**–न., **शाक० काकादनी** (सुसू. ४६.२३८) गुंजा.

**–निग्रहशील**–वि., **वेगनिग्रहरतः** ( ड. ) **नित्यं वेगधारणं कुर्वाणः** ( सुउ. ६१.५ )
मलमूत्रादिकांच्या उत्सर्जनाची प्रवृत्ति निर्माण झाल्यावर तिला अडवण्याची खोड असलेला.

**–प्रवर्तन**–न., **शारीरवेगानां प्रवृत्तिः** (चसू. १६.५)
मलमूत्रादी शारीर वेग–प्रवृत्ति. वेग निर्मिति.

**–रोधिन्**–वि., **वेगधारणशीलः** ( असंसू. ९.७९ )
पहा 'वेगनिग्रहशील.' वेग अडवणारा.

**–वत्**–वि., **प्रसरणशीलः** ( ड. सुउ. ३९.२३ )
पसरणारे, वेगवान.

**-विघात**-पु., **वेगावरोधः** ( सुचि. ९.३ )
पहा 'वेगधारण.' वेग मोडणे.

**-विधारण**-न., **वेगधारणम्** ( असंसू. ९ )
'वेगधारण' पहा. वेग धरणे, न सोडणे.

**-विधारिन्**-वि., **वेगावरोधकः** ( अहृसू. ८.१० )
पहा 'वेगनिग्रहशील.' वेग धरणारा.

**-संधारण**-न., **वातविण्मूत्रादिवेगानामवरोधः** ( चसू. २५.४० )
पहा 'वेगधारण.' वेग धरणे.

**-हानि**-पु., **वेगनाशो वेगनिर्गमनम्** (सुउ. ३९.७४)
ज्वराच्या पाळीचा वेग नाहीसा होणे. मलमूत्रोत्सर्जनाची उत्पन्न झालेली प्रवृत्ति ( आलेला वेग ) नाहीसा होणे.

**वेगागम**-पु., **वेगप्राप्तिर्वेगस्याऽऽगतिः** ( सुउ. ३९.७३ )
मलमूत्रादिकांच्या उत्सर्जनाची प्रवृत्ती-गति निर्माण होणे. वेग येणे. वेग संज्ञा.

**वेगाघात**-पु., **वेगधारणम्** ( सुउ. ५०.४ )
पहा ' वेगधारण. ' वेग मोडणे.

**वेगान्तर**-न., **अन्यो वेगः** ( सुक. २.४४ )
एक वेग-झटका संपल्यावर-वेग शांत झाल्यावर येणारा दुसरा वेग-झटका.

**वेगापाय**-पु., **वेगहानिः** ( सुउ. ३९.१४५-१४६ )
वेग नष्ट होणे. पहा 'वेगहानि'.

**वेगाभिघातशील**-वि., **वेगनिग्रहणकरः** ( असंसू. २७.३३ )
पहा 'वेगनिग्रहशील'.

**वेगित**-वि., **वेगयुक्तः** ( अहृसू. २.१९ ) वेगयुक्त.

**वेगिन्**-पु., रोग० **बाह्यायामः** ( असंनि. १५.२९ )
बाहेरच्या बाजूला-पाठीकडच्या बाजूला वाकणारा धनुर्वात.

**( वेगिनी )**-स्त्री., रोग० **हिध्मा, यमलापरपर्याया** ( असंनि. ४.२४ )
वेगिनी उचकी. प्रत्येक वेळी दोनदा उचकी येणे. दुसरे नाव यमला.

**वेगोदीरण**-न., **वेगोत्पत्तिः** ( अहृसू. १२.४१ )
मलमूत्रादिकांच्या उत्सर्जनाची गति-वेग मुद्दाम उत्पन्न करणे, मुद्दाम कुंथणे.

**वेड**-न., **सार्द्रविच्छिन्नचन्दनः** ( काखिल. १५.१६ )
ओल्या चंदनाचे तुकडे.

**वेणागमूलक**-न., वनस्पति० **उशीरम्** ( रा. १२.२६ )
काळा वाळा.

**वेणिका**-स्त्री., **गुणत्रयग्रथितउपयन्त्र०** ( सुसू. ७.१५ ) **विषवारणिका रज्जुः, विषदष्टस्य दंशोपरि बन्धनार्थं प्रयुक्ता** ( चचि. २३.३८ )
तीन पेडांची गुंफलेली वेणी. विषारी दंश झाल्यावर त्याच्या वरच्या बाजूला बांधावयाची दोरी. उपयंत्र.

**वेणी**-स्त्री., वनस्पति० **देवदाली** ( चक्र. चक. २.३, ध. १.१७३) देवडांगरी.

**वेणु**-पु., वनस्पति० **वंशः** ( ध. ४. १३७; चसि. ३.७ )
बांबु, वेळू, टोकर.
वाद्य० **वंशी** ( सुचि. ३४.१२ )
पावा, अलगूज, बासरी, मुरली.

**-करीर**-पु., **वंशमूलाऽङ्कुरः शाकः, तद्गुणाः-गुरुः कफमारुतकोपनश्च** ( सुसू. ४६.३०५ )
बांबूचे कोवळे कोंब. **गुण**— पचायला जड, कफ वात वाढविणारे.

**-गह्वर**-न., **वंशनलिकाऽभ्यन्तरम्** ( सुउ. १७. १९-२१ ) बांबूची आतली पोकळी.

**-ज**-पु., वनस्पति० **वेणुयवः** ( रा. १६.१२६ )
बांबूचे जव-धान्य-बी.

**-जात**-न., **शाक० कषायं वातकोपनं च** ( सुसू. ४६.२९३ )
बांबूचे कोवळे कोंब. तुरट आणि वातप्रकोपक.

**-नाडी**-स्त्री., **नाडीभाजनविशेषः** (सुउ. १७.८-१०)
मोठ्या बांबूच्या पोकळ एका बाजूने बंद असलेल्या नळीचे भांडे. ( औषध ठेवण्याकरिता उपयोगी भांडे ).

**-निर्लेखन**-न., **वंशतक्षणं, वंशत्वक्** (सुचि. १९.८)
बांबू तासणे. बांबू तासून काढलेली साल.

**-निस्वन**-पु., वनस्पति० **इक्षुः** (ध. ४.१२०) ऊस.

**-पत्रक**-पु., सर्प० **मण्डली** ( सुक. ४.३४(२) )
एक सर्प. घोणस.

**(-पत्रिका)**-स्त्री., **वंशपत्रम्** ( सुक. १.५२-५४ )
बांबूची पाने.

**-पत्री**-स्त्री., निर्यास० **नाडीहिङ्गु** ( ध. २.४० )
हिंगाचा प्रकार.

**-पर्णी**-स्त्री., **तृणधान्य०** ( असंसू. ७.१५ )
तृणधान्याचा प्रकार.

**-पर्वन्** न., **वेणुग्रन्थि, ग्रन्थ्यादिषु विमर्दनोपयोगि** ( असंउ. ३५ )
बांबूची गाठ, बांबूचे पेरे. गाठ इ० चोळण्यासाठी उपयोगी.

**-बीज**-पु., वनस्पति० **वेणुयवः** ( रा. १६.१२६ )
बांबूचे बी- जव-धान्य.

**-यव**-पु., वनस्पति० **वंशफलम्** ( चसू. २७.२० ) **वंशतण्डुलः** ( सुसू. २०.५ ) **तद्गुणाः-कषायोऽनुरसो मधुरः, कटुपाकी, रूक्ष उष्णः; शीतः** (रा) **बद्धमूत्रो वातकोपनः, कफहरः** ( सुसू. ४६.२६ ) **पित्तघ्नो वीर्यवृद्धिकरो बल्यः, प्रमेहक्रिमिविषनाशकः** ( रा. १६.१२६ ) द्र० ' वंश '
बांबूचे बी, जव, धान्य. तुरटरस अनुरस, मधुर, पचनानंतर तिखट, रूक्ष, उष्ण, (शीत) मूत्रावरोधकारक व वायूचा कोप करणारे, कफहर, पित्तनाशक, वीर्यवृद्धिकर, शक्तिदायक, प्रमेह, कृमि, विषनाशक.

**वेणुका**-स्त्री., **तन्नामकफलविषभेदः** ( सुक. २.५ )
एका विषारी फळाचा प्रकार.

**वेत**-पु., वनस्पति० **वेत्रः** ( रापरि. ७.१४ ) वेत.

**वेतस**-पु., वनस्पति० **तद्गुणाः-तिक्तः ईषत्कषायः, कटुः, स्वादुः, शीतो रक्षोघ्नो भूतनाशनो रुच्यो दीपनः कफपित्तघ्नो व्रणशुद्धिकरो रक्तपित्तनाशनश्च** ( ध. ५.११६ )
हिं.—बेंत.
**म.—वेत, थोरवेत.**
गु.—नेतर.
बं.—वेत.
फा.—वेत.
वेत. **गुण**—कडु, थोडासा तुरट, तिखट, गोड, शीत, भूतबाधानाशक, रुचिकर, दीपन, कफपित्तनाशक, व्रणशुद्धिकर, रक्तपित्तशामक आहे.
**सुगन्धिमूलम्** ( चक्र. चचि. ३.२५८ ) सुगंधीमूळ.
**वेत्रः** ( चसू. ३.२७ ) वेत.
**अम्लवेतसः** ( र. १५.६६ )
अम्लवेतस, आंबटचुका.
**शस्त्र० वेतसपत्राकारं शस्त्रम्, तद्व्यधनार्थमुपयुज्यते** ( अहसू. २६.९ )
वेताच्या पानांच्या आकाराचे शस्त्र. गळू वगैरे फोडण्यासाठी उपयुक्त.

**( वेतसी )**-स्त्री., वनस्पति० **जम्बूः** ( ध. ५.८४ )
जांभूळ.

**-पत्रक**-न., **व्यधनोपयोगिशस्त्रमङ्गुलविस्तारं चतुरङ्गुलमायतं, चतुरङ्गुलं वृन्तं; कैशिकी धारा** ( सुसू. ८.४ )
एक शस्त्र. एक अंगुल रुंदीचे पाते, चार अंगुल लांब आणि चार अंगुल मूठ व केसासारखी धार असलेले शस्त्र.

**-शाक**-न., शाक० **इदं कटुतिक्ताम्लं वातलमधोमार्गप्रवर्तनं च** ( चसू. २७.१०९ )
एक भाजी. ही तिखट, कडू, आंबट, वातकारक, दोषांना अधोभागी नेणारी.

**वेतसाम्ल**-न., वनस्पति० **अम्लवेतसः** ( चचि. १२.५५; ध. २.९६ )
अम्लवेतस. चुका.

**वेताल**-पु., **भूतयोनिविशेषः** ( चचि. २३.८८ )
**भूताधिपतिविशेषः** ( असंउ. ७ )
वेताळ. भूतांचा राजा.

**वेत्र**-पु., न., वनस्पति० **कषायः, शीतः, पित्तघ्नो भूतघ्नश्च** ( रापरि. ७.१४ ) **निर्वापणप्रदेहे उपयुज्यते** ( चसू. ३.२६ ) **तस्य पुष्पं विषाऽन्वितमस्ति** ( सुक. २.५ ) वेत.
**गुण**—तुरट, थंड, पित्त व भूतबाधानाशक, आंगाला लावण्याच्या द्रव्यात उपयोगी. याचे फूल विषारी असते.

**-करीर**-पु., **वेत्राङ्कुरः** ( सुसू. ४२.११ )
वेताचे अंकुर.

**-फल**-न., **पद्मबीजसमं फलम्** ( ड. सुसू. ४६.१३९ )
एक फळ. कमळाच्या बियांसारखे फळ.

**वेत्राग्र**-न., शाक० **वेत्रकरीरम्, तद्गुणाः-कफपित्तहरं तिक्तं शीतं कटुविपाकि च** ( चसू. २७.४; सुसू. ४६.२७० )
वेताच्या कोवळ्या डिऱ्या, कडू, थंड, कफपित्तहारक.

**वेत्राम्ल**-न., वनस्पति० **अम्लवेतसः** ( सुउ. १२.१७-१८ ) अम्लवेतस, चुका.

**वेद**-पु., **ऋग्वेदादिः** (चसू. ३०.२१) ऋग्वेद इत्यादी वेद.
**ज्ञानम्, वेत्ति इति वेदः ज्ञानम्** (अमरकोश) ज्ञान.
**आयुर्वेदः** ( सुसू. ३.४ ) आयुर्वेद.
**संख्यासंकेतविशेषः, चत्वारो वेदाः, तेन वेदपदस्य चतुःसंख्याभिधायकत्वम्** ( र. २९.२३-२४ )
चार ही संख्या. वेद चार असल्याने चार ह्या संख्येचा वाचक शब्द.

**( वेदी )**-स्त्री., **आसनम्, पिण्डिका** ( चशा. ८.१० )
आसन, मातीचा ओटा, बोहले.

**–भूव्हा**–स्त्री., वनस्पति० गन्धपलाशः ( रा. ६.९० )
एक प्रकारचा कचोरा.

**–यितृ**–पु., **मनसो ज्ञापयिता** ( सुशा. ३.४ )
मनाची जाणीव देणारा.

**–वादिन्**–पु., **वेदप्रतिपाद्यैकानुवादकः, वेदसिद्धान्तानुगामी, आयुर्वेदवादी** ( ड. सुशा. ५.१८ )
वेदोक्त सांगणारे, वेदसिद्धांताप्रमाणेच वागणारे, आयुर्वेदाने सांगितल्याप्रमाणे करणारे.

**–विद्**–वि., **आयुर्वेदज्ञः** ( चसू. १.७६ )
आयुर्वेद जाणणारा.

**वेदना**–स्त्री., लक्षण० **दुःखम्** ( चशा. १.८६ )
दुःख. दुःखाची संवेदना. दुःखाचे ज्ञान.
**सुखदुःखोपलब्धिः** ( चशा. ४.१५ )
सुखदुःखाची निर्मिति, सुखदुःखाची जाणीव,
**रोगः** ( चशा. १.८६ ) रोग.
लक्षण० **शूलः** ( सुशा. १०.७ ) शूळ.
आविः, **प्रसववेदना** ( असंशा. ३.३० )
प्रसूतीची वेदना, वेण.

**–घ्न**–न., **शूलघ्नः** ( धूपः ) ( सुसू. ५.१७ )
शूलनाशक.

**वेदनाश्रयसंज्ञक**–वि., **वेदनाकारणत्वेन व्यपदिष्टम्, कारणत्वेनोक्तं कालाद्ययोगादि** ( चशा. १.३५ )
काल, अर्थ आणि कर्म ह्यांचा समयोग, हीनयोग, मिथ्यायोग, आणि अतियोग हे वेदनांचे म्हणजे सुखदुःखाचे कारण होय असा उल्लेख.

**वेदनास्थापन**–वि., **वेदनोच्छेदपूर्वकं शरीरस्य प्रकृतौ स्थापनम्** ( चसू. ४.१८ )
वेदना नाहीशा करून शरीर स्वस्थ करणे.

**वेदनास्थापन**–पु., द्रव्यगण० **महाकषायवर्गे एको गणः, वेदनायां संभूतायां तां निहत्य शरीरं प्रकृतौ स्थापयति । शालकट्फलकदम्बपद्मकतुम्बमोचरसशिरीषवञ्जुलैलवालुकाशोका इति दशेमानि वेदनास्थापनानि** ( चसू. ४.१८ )
वेदना थांबविणाऱ्या व स्वास्थ्यकारक औषधांचा गण. ( गण ) साग, कायफळ, कदंब, पद्मकाष्ठ, नागकेशर, सावरीचा डिंक, शिरीष, वेत, एलवालुक नावाचे सुगंधि द्रव्य, व अशोक ही १० औषधें वेदनास्थापक आहेत.

**वेदयितृ**–पु., **मनसो ज्ञापयिता** ( सुशा. ३.४ )
मनाचा जाणकार, मनाचे ज्ञान देणारा.

**वेदाङ्ग**–न., **शिक्षा कल्पो व्याकरणं छंदो ज्योतिषं निरुक्तं चेति षड्वेदाङ्गानि** ( काखिल. २.३ )
वेदाची अंगे. शिक्षा, कल्प, व्याकरण, छंद, ज्योतिष, निरुक्त ही सहा वेदाची अंगे होत.

**वेदिका**–स्त्री., **विवाहादिनिमित्तमामेष्टकादि रचितश्चतुरकः** ( सुसू. २९.३२ )
बोहोले. मुंजी, लग्न लावण्याचा विधि करण्याकरिता कच्च्या विटांनी रचलेला चौरस ओटा.

**वेदितृ**–पु., **आत्मा, जगद्वेदयतीति वेदिता** ( चशा. ४.८ )
ज्ञाता–जाणता–आत्मा. जग जाणणारा.

**वेदिनी**–स्त्री., **त्वग्विशेषः, पञ्चमी त्वक्, व्रीहेः पञ्चभागप्रमाणा** ( सुशा. ४.४ )
सुश्रुत मताने असलेल्या सहा त्वचापैकी पाचवी त्वचा, हिची जाडी व्रीही तांदळाच्या $\frac{५}{२०}$ ($\frac{१}{४}$)

**वेदोत्पत्ति**–स्त्री., **आयुर्वेदोत्पत्तिः** ( सुसू. ३.४ )
आयुर्वेदाची उत्पत्ति.
अध्यायसंज्ञा० ( सुसू. १.१ ) अध्यायाचे नाव.

**वेध**–पु., **व्यवायिगुणैरौषधैः सहितः मूषाद्रुतताम्ररजतादिद्रव्ये क्षिप्तः पारदः** ( र. ८.८८ ) **किमियानाम्ना प्रसिद्धः संस्कारः वेधविद्या रसार्णवाऽऽदौ दलविधाननाम्ना प्रसिद्धा** ( र. ५.११ )
मुशीत तांबे, रुपे इत्यादी धातु पातळ करून त्यात व्यवायि गुणांच्या औषधांसह पारा टाकतात. व त्याचे सोने बनते, या सोने बनवण्याच्या क्रियेला वेधक्रिया म्हणतात. किमया नावाने ही प्रसिद्ध आहे. रसार्णवादिग्रंथात ह्या क्रियेला दलविधान म्हटले आहे.

**–कर्मन्**–न., **वेधादिकं कर्म किमिया** ( र. ७.३-४ )
वेधक्रिया, किमया.

**–मुख्य**–पु., वनस्पति० **कर्चूरः** ( ध. ३.९४ )
कपुरकाचरी.

**(–मुख्या)**–स्त्री., भैषज्य० **कस्तूरिका** ( ध. ३.२८ )
कस्तुरी.

**वेधक**–पु., वनस्पति० **अम्लवेतसः** ( रा. ६.१४६ )
अम्ल वेतस, चुका.
न., वनस्पति० **धान्यकम्** ( रा. ६.९८ ) धणे.

**वेधनी**–स्त्री., वनस्पति० **वनमेथिका** ( रा. ५.१८४ )
रानमेथी.

**वेधिन्**–पु., वनस्पति० **अम्लवेतसः** ( रा. ६.१४६ )
अम्लवेतस, चुका.

**वेध्य**–न., **अष्टविधशस्त्रकर्मस्वेकम्, अल्पमुखैः शस्त्रै-र्व्यधनीयं सिरादि** (ड. सुसू. ५.५) **वेध्यविषयाः– बहुविधाः सिरा मूत्रवृद्धिर्दकोदरम्** ( सुसू. २५.१० )
आठ प्रकारांपैकी एक शस्त्रकर्म. लहान तोंडाच्या शस्त्रांनी शिरांचा वेध. उदर, मूत्रवृद्धि यात उदराचा, ही अण्डकोशाचा वेध करतात.

**वेपक**–पु., **वेपनम्, कम्पनम्, तेन वेपको रोगत्वेन कम्पनम्** ( सुचि. ३६.४५ ) कंप. कापणे ( थरथर ).

**वेपथु**–पु., **लक्षण० कम्पः, वेपनम्** ( चनि. १.२१; सुचि. २४.८७ )
**रोग० अशीतिवातविकारेष्वेकः** ( चसू. २०.११ )
कंप. अवयव सारखा हालणे. ८० वातविकारांपैकी एक.

**वेपन**–न., **वातरोग० कम्पः** ( चचि. २८.१३४; सुशा. ६.२४ )
वातरोग. कंप.

**वेपमान**–वि., **कम्पमानः** ( सुउ. ६१.११ )
कापणारा, कंप असलेला.

**वेला**–स्त्री., **कालः** ( सुउ. ३९.७२ ) काळ, वेळ.
**कूलमर्यादा, तीरम्** ( सुचि. ३५.३० )
तीर ( नदी इ० चे ) काठ, किनारा.

**वेल्ल**–पु., न., **वनस्पति० विडङ्गः** ( असंउ. ४७; अहसू. १५.४ )
वावडिंग.
**मरिचम्** ( र. २.७५ ) मिरे.

**वेल्लन्तर**–पु., **वनस्पति० वालकम्** ( अहसू. १५.२४ )
काळा वाळा.

**वेल्लरिका**–स्त्री., **वनस्पति० वृद्धदारुः** ( असंउ. ४९ )
वरधारा.

**वेल्लितक**–पु., **वैकरञ्जेभ्यस्त्रिभ्यो जातः सर्पविशेषः अयं मण्डलिसर्पविशेषवद्वर्तते** ( सुक. ४.३४ )
या नावाचा मंडली जातीचा साप. वैकरंज जातीच्या तीन सर्प जातींच्या पासून उत्पन्न होतो.
न., **सीवनप्रकारेष्वेकः, तच्च कुटिलं तिर्यक् प्रणिहितया सूच्या सूत्रेणैकेनावेष्ट्य संपादितम्** ( सुसू. २५.२१ )
शिवण्याचा एक प्रकार. वेलासारखा दोरा घालणे. वाकड्या व तिरक्या सुईत एक दोरा घालून शिवण्याचा प्रकार.

**वेल्लितबन्ध**–पु., **बन्ध० तिर्यक्स्थे शाखाघाते घनवाससाऽसौ प्रसंपाद्यः** ( असंउ. ३१ )
शाखेला म्हणजे हातापायावर तिरका आघात झाला असता जाड वस्त्राने वेलीसारखा गुंडाळीत बांधावयाचा बंध.

**वेशवार**–पु., **संस्कृतमांसविशेषः निरस्थि पिशितं पिष्टं स्विन्नं घृतगुडाऽन्वितं कृष्णामरिचसंयुक्तम्, तद्गुणाः–गुरुः स्निग्धो बलोपचयवर्धनः** ( चसू. २७.२६९; सुचि. २.२५ )
मांसाची बनावट. मांसाचा बनविलेला पदार्थ. हाडे काढून मांस बारीक वाटून तूपगुळासह शिजवून त्यात पिंपळी, मिरे घालून केलेला प्रकार. हा पचण्याला जड, स्निग्ध आणि बल, पुष्टी वाढवणारा आहे.
**शाकादिषु व्यञ्जनार्थमुपयुक्तं धान्यजीरकादियुक्तं चूर्णम्, उपस्करः** ( चसू. १४.४२ ) **व्यञ्जनम्** ( सुचि. ३२.१२ )
भाज्या इत्यादींमध्ये चवीकरिता धणे, जिरे इत्यादिकांचे घातलेले चूर्ण. मसाला. कूट ( तीळकूट इ० ) एक प्रकारचे तोंडी लावणे.

**वेशवारोपनाह**–पु., **उपक्रम० स्वेदविशेषः** ( सुचि. ३२.१२ )
वेशवाराने केलेला शेक.

**वेश्मन्**–न., **गर्भिणी यत्र वसति तत्स्थानम्** ( का. जातिसूत्रीय )
गर्भिणी रहाबयाची जागा.

**( वेश्म )–कुलिङ्ग**–पु., **गृहकुलिङ्गस्तद्गुणाः– रक्तपित्तहरोऽतिशुक्रलश्च** ( सुसू. ४६.७१ )
गावठी चिमणी. हिचे मांस रक्तपित्तनाशक आणि अति शुक्रवर्धक आहे.
**–धूम**–पु., **अगारधूमः, गृहधूमः** ( चचि. २६.१४ )
घेरोसा.

**वेश्य**–पु., **वेश्म** ( असंसू. ७.७९ )
घर. पहा ' वेश्मन् '.

**वेष**–पु., **नेपथ्यम्** ( अहसू. २.३१ ) पोषाख, अलंकार.

**वेष्ट**–पु., **निर्यास० श्रीवेष्टकः** ( रा. १२.१९२ )
एक सुवासिक डिंक.
न., **वेष्टनम्, दन्तवेष्टनम्** ( सुनि. १६.२१-२३ )
दातावरील मांसावरण, मांसवेष्टन, हिरडी, हिरड्या.
**–सार**–पु., **निर्यास० श्रीवेष्टकः** ( रा. १२.१९३ )
सुगंधी डिंक.

**वेष्टक**–पु., वनस्पति० शाल्मली ( ध. ५.१२६ ) सावरी. श्रीवेष्टकः ( रा. १२.९२ ) सुगंधी धूप.

**वेष्टन**–न., **अग्रन्थिबन्धनं सर्पादिभिः** ( चसू. १८.४ ) गांठ न बांधता बांधलेले बंधन. वेष्टण. वेढा. सर्पाचे वेष्टन, वेढा, वेढणे.

**अवचूर्णनम्** ( चक्र. चक. ७.५४ )
चूर्ण पसरणे, भुरभुरणे.

**लक्षण० उद्वेष्टनम्** ( चसू. १७.३१ ) **वलनम्** (हे.) **ग्रथनमिवाऽङ्गस्य** ( अरु. अहृसू. १२.५० )
रोगाचे लक्षण. वळणे ( पिंढऱ्या वळणे, हातपाय वळणे ) अवयवात गाठ बांधली जाते आहे अशी वेदना.

**वेसवार**–पु., **संस्कृतमांसविशेषः वेशवारः** (चसू. ३.१९) पहा 'वेशवार'.

**स्विन्नपिष्टमुद्गादिकल्कः** ( सुसू. ४६.४०० )
मूग इत्यादिकांचे दळलेले किंवा वाटलेले पीठ वाफवून तयार केलेला पदार्थ.

**वेसवाराम्बुरूप**–वि., **वेसवारसंमिश्रजलसदृशम्** ( सुउ. ४०.१९ )
पातळ 'वेशवाराच्या' पाण्यासारखे दिसणारे. पहा 'वेशवार'.

**वैकरञ्ज**–पु., **सर्प० संकीर्णजातः पृथग्जातीयसर्पिणीपृथग्जातीयसर्पाभ्यां जातो वैकरञ्जः** ( सुक. ४.९-१० )
**वैकरञ्जास्त्रयः–तद्यथा–माकुलिः पोटगलः स्निग्धराजिरिति, तत्र कृष्णसर्पेण गोनस्यां वैपरीत्येन वा जातो माकुलिः, राजिलेन गोनस्यां वैपरीत्येन वा जातः पोटगलः, कृष्णसर्पेण राजिमत्यां वैपरीत्येन वा जातः स्निग्धराजिरिति, तेषामाद्यस्य माकुले, पितृवद्विषोत्कर्षः, द्वयोर्मातृवदित्येके** ( सुक. ४.३४)(५)
सर्पाची संकीर्णजात. मिश्रजातीचा सर्प. या वैकरंजामध्ये तीन प्रकार आहेत. माकुलि, पोटगल, स्निग्धराजी. कृष्णसर्प आणि घोणस यांच्यापासून निर्माण झालेला तो माकुलि; राजिल आणि घोणस यांच्यापासून निर्माण झालेला तो पोटगल; कृष्णसर्प आणि राजिमत यांपासून झालेला तो स्निग्ध राजी. यांपैकी पहिला प्रकार माकुली सर्पाचे विष बापाप्रमाणे म्हणजे कृष्णसर्पाप्रमाणे असून इतर दोन्ही प्रकारचे सर्प आईच्या विषाप्रमाणे विषारी असतात.

**वैकरञ्जोद्भव**–वि., **वैकरञ्जाज्जातः, वैकरञ्जेभ्यस्त्रिभ्यो जातः तद्यथा–दिव्येलकः, रोध्रपुष्पकः, राजिचित्रकः, पोटगलः, पुष्पाभिकीर्णः, दर्भपुष्पः, वैल्लितकश्चेति, तेषामाद्यास्त्रयो राजिलवत् शेषाः मण्डलिवत्** ( सुक. ४.३४ )
वैकरंज या मिश्र जातीच्या सापांपासून झालेला साप- दिव्येलक, रोध्रपुष्पक, राजिचित्रक, पोटगल, पुष्पाभिकीर्ण, दर्भपुष्प आणि वैल्लितक यातील पहिले तीन राजिल सर्पाप्रमाणे व बाकीचे मंडलीसर्पाप्रमाणे विषारी असतात.

**वैकल्यकर**–वि., **वैकल्यं कर्मासमर्थत्वम्, तत्करम्** ( सुशा. ६.२२ )
कर्म करण्यास असमर्थ बनवणारे, एखाद्या अवयवाला निकामी बनवणारे.

**–मर्मन्**–पु., **मर्म० चतुश्चत्वारिंशद्वैकल्यकराणि मर्माणि** ( सुशा. ६.८ ) **तानि लोहिताक्षादीनि** ( सुशा. ६.१२-१३ )
**वैकल्यकराणि सौम्यानि, सोमो हि स्थिरत्वाच्छैत्याच्च प्राणाऽवलम्बनं करोति** ( सुशा. ६.१६ )
ज्या मर्मावर आघात झाला असता त्या मर्माचा अवयव त्याचे कर्म करण्यास कमी जास्त निरुपयोगी होतो ते मर्म. लोहिताक्ष इ. सौम्य मर्मे.

**वैकारिक**–वि., **विकृतिभवम्** ( चशा. ४.२५ )
विकृतिजन्य, विकार पावणारे.

**( वैकारिकी )**–स्त्री., **विकारभवा निद्रा** ( सुशा. ४.३३ )
विकाररूप निद्रा, झोप हा रोग, निद्रारोग.

**–वर्ण**–पु., **विकृतवर्णः, नीलश्यावताम्रहरितशुक्लाश्च वर्णाः, शरीरस्य वैकारिका भवन्ति** ( चइ. १.९ )
शरिराचा मूळ वर्ण बदलून विकृत असे निळा, काळा तांबडा, पांढरा, हिरवा असे उत्पन्न झालेले वर्ण, हे वैकारिक वर्ण होत.

**–स्वर**–पु., **विकृतस्वरः विकारजनितः स्वरो वा एडककलग्रस्ताऽव्यक्तगद्गदक्षामदीनाऽनुकीर्णास्त्वातुराणां स्वरा वैकारिका भवन्ति** ( चइ. १.१४ )
विकारामुळे मूळचा स्वर बदलून निराळा स्वर होणे. विकृत स्वर. एडक्यासारखा रेकणारा, सूक्ष्म, रूक्ष, उच्चारच न निघणे, अस्पष्ट, अडखळणारा, थकलेला, दुःखी आणि चिरका हे सर्व विकृत स्वर होत.

**वैकारिकाहंकार**–पु., **अहंकारभेदः, सात्त्विकः अहंकारः** ( सुशा. १.४ )
अहंकाराचा प्रकार, सात्विक अहंकार.

**वैकिर**–न., जल० सिकतां विकीर्य यज्जलमाऽऽपद्यते तत्, तस्य गुणाः–कटु, सक्षारं, श्लेष्मघ्नं, लघु दीपनं च ( सुसू. ४५.३५ )
खडकावर आपटून फुटलेले पाणी. धबधब्याचे पाणी. पाण्याची धार खडकावर पडून फुटलेले पाणी. वाळू बाजूला करून मिळालेले पाणी. हे तिखट, किंचित क्षारयुक्त, कफनाशक, पचनास हलके व अग्निदीपक असते.

**वैकुण्ठ**–पु., वनस्पति० अर्जकः ( रा. १०.८५ )
तुळस, पांढरा अजवला.

**वैकृत**–न., विकारः विकृतिरेव वैकृतम् ( सुसू. १४.३ ) स्वभावतः प्रकृतितो यद्वैकृतमन्यथात्वं तत् ( सुसू. २८.८
विकृत. मूळस्वभाव आणि प्रकृतीत बिघाड उत्पन्न झालेले.
वि., विकारभवः ( असंशा. ८ )
विकारापासून झालेले.

**( वैकृती )**–वि., विकृतिमूला ( चसू. १७.११५ )
विकृत दोषाची. विकृतीपासून झालेली.

**वैकृत्य**–न., अन्यथात्वम् ( सुउ. ३९.११६ )
निराळेपणा. विपरीत होणे. बदलणे. बिघडणे.

**वैक्रान्त**–पु., न., रत्न० महारसेष्वेकं, खनिजोपल० गुणाः– आयुष्यं बल्यं वर्ण्यमतिवृष्यं दीपनं रसायनम् । प्रमेह–वार्धक्य–क्षय–ग्रहणी–कासघ्नश्च ( ध. ६.४४ ) तस्य द्रुतिविधानम्–अम्लवेतसरसेन भावितं शुक्लवर्णं वैक्रान्तं तीव्रातपे सप्ताहात् द्रवतां गच्छति । केतकीस्वरसः सैन्धवं स्वर्णपुष्पिकेन्द्रगोपश्चैतत् सर्वं भाण्डे विनिक्षिपेत् । तस्मिन्भाण्डे सप्तदिनपर्यन्तं वैक्रान्तं स्वेदयेत् । एवं सप्तदिनस्वेदनाऽनन्तरं तद् द्रवतां गच्छति ( र. ४.७५ )
महारसांपैकी एक. तोरमल्ली रत्न. त्याचे गुण— आयुष्य, बलवर्धक, वर्णकर, अतिवृष्य, दीपन आणि रसायन आहे. प्रमेह, क्षय, वार्धक्य, खोकला नाशक आहे. त्याची द्रुति करण्याची रीत— अम्लवेतसाच्या रसाने भावित पांढरा वैक्रांत तीव्र उन्हात ७ दिवस तापल्याने द्रव होतो. एका भांड्याला केतकीस्वरस+सैंधव+स्वर्णपुष्पिका+इंद्रगोप यांच्या मिश्रणाचा लेप द्यावा. त्या भांड्यामध्ये सात दिवस पर्यंत वैक्रांत उकळावा. सात दिवसांनंतर तो द्रव होतो.

**वैखानस**–पु., ऋषि० रोगाऽपहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिषु एकः ( चसू. १.१३ )
रोगनिवारणाचा विचार करण्यासाठी हिमालयाच्या पायथ्याशी जमलेल्या ऋषींपैकी एक ऋषी.

**वैगन्धिक**–पु., शुद्धगन्धकः ( चक्र. ) त्रिजातकश्चतुर्जातकः । जज्झटः ( चचि. २३.२२३ )
शुध्द गंधक; त्रिजातक ( दालचिनी, वेलची, तमालपत्र, हे त्रिजातक). चतुर्जातक. ( नागकेशरयुक्त त्रिजातक. )

**वैगुण्य**–न., विगुणस्य भावः, विषमो गुणः ( चवि. ३.१९ )
वैगुण्य, विषम गुण, भिन्न गुण.
वक्रता ( सुचि. १५.४ ) वाकडेपणा.

**वैचित्त्य**–न., विकृतचित्तत्वं, क्षुब्धमनस्त्वम् ( चचि. ३.३६ )
मनोविकृति, मनाचे विकृतत्व. मनाची क्षुब्धता. क्षुब्ध चित्तत्व.
उन्मादादिमानसविकारः ( सुचि. ३९.१४ )
उन्माद इत्यादी मनोविकार.

**वैजयन्तिका**–स्त्री., वनस्पति० अग्निमन्थः (रा. ९.१३६)
अरणी, पांढरी टाकळी.

**वैजयन्ती**–स्त्री., वनस्पति० अग्निमन्थः ( सुचि. ४.३२ )
अरणी, पांढरी टाकळी.
मुक्तकः ( इन्दु. असंउ. २२ ) नागरमोथा.
टाहकळा इति भाषायामिति ( इन्दुः असंचि. १४ )
टाकळी.

**वैडुर्यप्रभराज**–पु., देवता० (अहसू.१८.१७३) एक देवता.
विदूरगिरिसंभवम् ( सुउ. १५.२६ )
एक देवता, विदूर पर्वतात झालेला वैदूर्य मणी.

**वैडूर्य**–पु.; न., रत्न० ( असंसू. ८.९६ ) शुभवैडूर्यलक्षणम्–श्यामवर्णं शुभ्रवर्णं श्वेतवर्णं वा । सर्वतः समानाऽऽकारं समं प्रकाशमानम् । निकृष्टवैडूर्यलक्षणम्–श्याम-तोयसमच्छायं चिपिटं लघ्वल्पभारं कठिनं रक्तवर्णगर्भितं रेखासहितम् । वैडूर्य-गुणाः– रक्तपित्तघ्नं प्रज्ञाऽऽयुर्बलवर्धनं दीपनं मलमोचनं पित्तप्रधानरोगघ्नं च ( र. ४.६१-६२-६३ ) अक्षिरोगनुत् ( चचि. २६.२४६ ) विषघ्नम् ( चचि. २३.२५२-२५३ ) लेखनम् ( सुसू. ४६.३२९ )

वैडूर्य नावाचे रत्न. शुभ वैडूर्याचे स्वरूप–श्यामवर्ण, शुभ्रवर्ण, श्वेतवर्ण सर्व बाजूने सारख्या आकाराचा सारखी चमक असणारा असतो. हलका वैडूर्य पाण्यासारखी काळसर झाक असलेला, चपटा, वजनात हलका, कठीण, आत लालसर, व रेषायुक्त, असतो. वैडूर्य गुण—रक्तपित्तशामक; प्रज्ञा, आयुष्य, बल वाढविणारा आहे. दीपन, मलमोचन, विषनाशक आहे.

**वैणव**–वि., **वेणुमयम् वेणुभवं वेणुकृतं वा** ( सुसू. २६.१९ )
बांबूमय–बांबूचे–बांबूपासून केलेले. बांबूपासून उत्पन्न झालेले.

**वैतरण**–पु., **धन्वन्तरिशिष्येष्वेकः** ( सुसू. १.३ )
धन्वन्तरीच्या शिष्यांपैकी एक.

**वैदर्भ**–पु., **दन्तमूलरोगः दन्तमूलेषु जायमानो रोगः, तत्र दन्ताश्चला भवन्ति, अयमभिघातजवैदर्भ इत्युच्यते** ( सुनि. १६.२३-२४ )
दातांच्या मुळांचा रोग. दात हालतात. आघाताने हा होतो. म्हणून याला अभिघातज वैदर्भ म्हणतात.

**वैदल**–वि., **मुद्गादि० माषकुलत्थादयो हि न वैदलत्वेन निर्दिष्टाः, शिम्बिदलयोर्विभजनात् वैदलत्वं मुद्गादीनाम्। मुद्गवनमुद्गकलायमकुष्ठमसूरमङ्गल्य-चणकसतीनत्रिपुटकहरेण्वाढकीप्रभृतयो वैदलाः** ( सुसू. ४६.२७ ) **तत्कृतभक्ष्यम्, गुणाः–कषायं सृष्टमारुतं लघु च** ( सुसू. ४६.४०२ ) **वैदलानां सामान्यगुणमाह कषायमधुराः शीताः कटुपाकाः वातकरा बद्धमूत्रपुरीषकराः पित्तश्लेष्महराश्च** ( सुसू. ४६.२८ )
द्विदल. मूग, रानमूग, वाटाणा, मठ, मसूर इत्यादी द्विदल होत. द्विदल धान्याचा केलेला खाण्याचा पदार्थ. वैदलांत उडीद कुळीथ इत्यादिकांचा समावेश नाही.
द्विदल धान्याचे सामान्य **गुण**—तुरट, गोड, थंड, पचनानंतर तिखट, वात करणारी, मलमूत्रांना अवष्टंभ करणारी आणि पित्तकफशामक आहेत.
**कीट० तद्गुणाः–वायव्योऽसौ वातरोगान् करोति** ( सुक. ८.५-८ )
एक किडा, हा वायवीय आहे. वातरोगकारक.

**वैदूर्य**–पु., न., **रत्न० वैदूर्यम्** ( चचि. २३.२५२-५३; र. ४.६१ )
वैडूर्य मणी,

**–पात्र**–न., ( परिव० ) **वैदूर्यरत्नरचितं भाजनम्** ( असंसू. १०.३६ )
वैडूर्य मण्याने मढवलेले भांडे–पात्र.

**वैदेहनिमि**–पु., ऋषि० ( कासू. २७.३ ) एक ऋषि.

**वैदेहिका**–स्त्री., **वनस्पति० पिप्पली** ( असंउ. ४७ )
पिंपळी.

**वैदेही**–स्त्री., **लूता० संकीर्णा लूता० तस्याः दंशलक्षणानि–अग्निदग्धनिभो भृशवेदनायुक्तो गम्भीरो हृत्पीडा-तीक्ष्णज्वरमोहयुक्तश्च** ( असंउ. ४५ )
एक विषारी किडा, लूत. निरनिराळ्या जातीच्या नरमादी लूतांची मिश्र प्रजा असलेला किडा. दंश लक्षणे–दंशस्थान अग्नीने जळाल्यासारखे, तीव्र वेदना, हृदयात खोल पीडा, तीव्र ज्वर आणि मोह.
**वनस्पति० पिप्पली** ( रा. ६.१०९ ) पिंपळी.

**वैद्य**–पु., **भिषक्, विद्यायोगाद्वैद्यत्वम्** (चचि. १.(४).५२-५३) **वैद्यगुणाः–पर्यवदातश्रुतता, परिदृष्टकर्मता, दाक्ष्यं, शौचं, जितहस्तता, उपकरणवत्ता, सर्वेन्द्रियोपपन्नता, प्रकृतिज्ञता, प्रतिपत्तिज्ञता च** ( चवि. ८.८६ ) **वैद्यश्च तत्त्वाधिगतशास्त्रार्थः स्वयंकृती लघुहस्तः शुचिः, शूरः, सज्जोपस्करभेषजः प्रत्युत्पन्नमतिर्धीमान् व्यवसायी विशारदः, सत्यधर्मपरः** ( सुसू. ३४.१९-२० ) **कुलीनो धार्मिकः स्निग्धः सुभृतः सततोत्थितः अलुब्धोऽशठो भक्तः कृतज्ञः प्रियदर्शनः क्रोधपारुष्यमात्सर्यमायाऽऽलस्यविवर्जितो जितेन्द्रियः क्षमावान् शीलदयान्वितः असंभ्रान्तोऽनुरक्तः हितैषी प्रगल्भो निपुण आलस्यवर्जितः** ( सुक. १.८-११ ) **रसविशारदः स्यात्** ( सुसू. ३४.७ )
**वैद्यस्य शस्त्रकर्मणि गुणाः–शौर्यमाशुक्रिया शस्त्रतैक्ष्ण्यमस्वेदवेपथुरसम्मोहश्च** (सुसू. ५.१०) **द्विविधो वैद्यः–प्राणाऽभिसरः रोगाऽभिसरः** ( चसू. २९.५)
वैद्य. भिषक्. विद्येमुळे ( वैद्यकीय ) ज्ञान प्राप्त झालेला तो वैद्य. वैद्यगुण–श्रेष्ठ प्रतीची विद्वत्ता, प्रत्यक्षाच्या साहाय्याने शास्त्रज्ञान आत्मसात केलेला, आपल्या कर्तव्यामध्ये चतुर असलेला, कायावाचामनाने पवित्र, चिकित्सेत यशस्वी, सर्व उपकरणे असणारा, सर्व इंद्रिये कार्यक्षम असणारा, प्रकृति समजणारा, समयसूचक, स्वतःच्या बुद्धीने चिकित्साकार्य करणारा, हाताला कंप इ० नसलेला, खिन्न न होणारा, बुद्धिमान, कठीण

प्रसंगीही चिकित्सा कार्यात न डगमगणारा, सत्यवादी, कुलवान, प्रेमळ, प्रभावशाली व्यक्तिमत्व असलेला, नित्यकार्यतत्पर, न फसवणारा, केलेले जाणणारा, दिसण्यात चांगला, राग-कठोरता-मत्सर व आळस रहित, संयमी, क्षमावान, सुशील आणि दयाळू, न थकता काम करणारा, रोग्यावर प्रेम करणारा, कार्यनिष्णात, द्रव्याचे रस विपाकादी जाणणारा. एकंदरीत वैद्य दोन प्रकारचे. १) **प्राणाभिसर** म्हणजे प्राणरक्षक. प्राणाची स्थाने, इंद्रिये, आयुर्वेदज्ञान आत्मा आणि रोग व त्यांची कारणे जाणणारा. आणि २) **रोगाभिसर**— या सर्वही गुणांच्या विरुद्ध असा प्राणघातक वैद्य.

**–नाथ**–पु., **योग० शङ्खभस्म निष्कमात्रं कपर्दिकाभस्म चतुर्निष्कं मयूरतुत्थं कर्षांशं हरितालगन्धकटङ्कणानि कर्षमात्राणि रौप्यनागपारदभस्मान्यर्धकार्षिकाणि चित्रकक्काथेन संमर्द्य वराटमण्डूरचूर्णेन तद्गोलकं विलिप्य गजपुटे पचेत्। मात्रा–अर्धमाषा। अनुपानं–ताबूलरसमर्दितं मरिचचूर्णं ताबूलपत्राऽवलिप्तं मधुना हैयंगवीनेन घृतेन वा युक्तम्। मर्यादा–द्वाचत्वारिंशदष्टचत्वारिंशद्वा दिनानि। अयं योगः क्षयनाशकः** ( र. १४.५२ )
क्षयनाशक एक सिद्धयोग. वैद्यनाथ या सिद्धौषधात शंखभस्म चार मासे, कपर्दिक भस्म सोळा मासे, मोरचुदाचे चूर्ण १ तोळा, हरताळ-गंधक-टंकण एक एक तोळा, रौप्य भस्म, नागभस्म, पारदभस्म अर्धा अर्धा तोळा चित्रकाचे काढ्यात घोटून तो गोळा कवड्या आणि मंडूर यांच्या चूर्णाने लिंपून गजपुट द्यावे. म्हणजे लोकनाथरस तयार झाला. घेण्याचे प्रमाण—अर्धा मासा. अनुपान—विड्याचे पानात घोटलेले मिरीचूर्ण, विड्याच्या पानात मधाबरोबर किंवा ताज्या तुपातून द्यावे. घेण्याच्या मर्यादा–बेचाळीस दिवस किंवा अठ्ठेचाळीस दिवस. हा योग क्षयनाशक आहे.

**–मानिन्**–वि., **अवैद्यमप्यात्मानं वैद्यं मन्यमानः** ( चवि. ३.४५ )
स्वतः वैद्य नसून वैद्य म्हणविणारा. वैद्यक न शिकता स्वतःला वैद्य म्हणविणारा.

**–वाक्यकृत्**–वि., **वैद्यवाक्यमविकल्पम् आचार्यत्वेन अनुरुध्यमानः परिचरगुणेष्वेकः** ( सुसू. ३४.२४ )
वैद्याची आज्ञा गुरुसारखी प्रमाण मानून त्याप्रमाणे वागणारा. परिचारकाचा एक गुण,



**–वाक्यस्थ**–वि., **वैद्यवचनकरः, व्याधितगुणेष्वेकः गुणः** ( सुसू. ३४.२१-२२ )
रोग्याचा एक गुण. वैद्याच्या सांगण्याप्रमाणे वागणारा.

**–विदग्ध**–वि., **वैद्यमानी, वैद्यंमन्यः** ( चसि. २.५ )
वैद्य म्हणविणारा.

**–समूह**–पु., **वैद्यसमुदायः, स च निःसंशयकराणां श्रेष्ठः** ( चसू. २५.४० )
वैद्यांचा समुदाय. निदान चिकित्सेमधील संशय नाहीसा करण्याच्या अनेक उपायात श्रेष्ठ.

**वैद्युत**–वि., **वैद्युतो नाम दिव्याग्निभेदः** ( सुचि. ३.२६-२७ )
वीज इत्यादी दिव्याग्नि प्रकार.
वि., **विद्युत्सम्बन्धी** ( असंशा. ५.५६ )
विजेसंबंधी.

**वैद्रुम**–वि., **विद्रुमसम्बन्धि ( चूर्णम् )** ( सुउ. १०.१५ )
प्रवाळाचे. प्रवाळचूर्ण.

**वैधर्म्य**–न., **विरुद्धो धर्मः** ( चवि. ८.३६ ) **विसदृशो धर्मः** ( सुशा. १.९ ) **विधर्मो नाम विरुद्धधर्मो विपरीतधर्मो वा, तद्भत्वं वैधर्म्यम्**
विरुद्ध धर्म, असमानधर्मत्व, विधर्मत्व, भिन्न धर्म असणे.

**वैधात्री**–स्त्री., **वनस्पति० ब्राह्मी** ( रा. ५.१४७ ) ब्राह्मी. **आमलकी** ( र. २३.६४ ) आवळा.

**वैनतेय**–पु.. देवता० **विनतात्मजो गरुडः** ( असंसू. ८.९४ )
विनतेचा पुत्र वैनतेय. गरुड. एक देवता.

**वैपादिक**–न., **रोग० क्षुद्रकुष्ठेष्वेकम्, तत्र लक्षणम्–पाणिपादस्फुटनं तीव्रवेदनम्** ( चचि. ७.२२ )
पायफुटी. हातपाय फुटणे व वेदना होणे. क्षुद्रकुष्ठांपैकी एक.

**वैपादिका**–स्त्री., **रोग० वैपादिकम्** ( सुचि. २५.४२ )
पहा 'वैपादिक'.

**वैमल्य**–वि., **विमलता, शुद्धिः** ( अहसू. ४.३० )
निर्मलता, शुद्धि.

**वैयाघ्र**–वि., **व्याघ्रस्येदं नाम व्याघ्रसम्बन्धि यथा तच्चर्मादि** ( चशा. ८.१० )
वाघासंबंधी. वाघाचे कातडे इत्यादी.

**वैरस्य**–वि., **लक्षण० विरसता** ( चसू. ५.७२ ) **अनिष्टरसता** (चइ. २.१९) **उचिताद् आहाररसादन्यथात्वम्** (चक्र. चसू. २८.९-१०) **रसदोषजविकारेष्वेकः** ( सुसू. २४.९ )

विरसता. अनिष्टरसता, भिन्नरसता, रसग्रहण सामर्थ्याचा अभाव. रसग्रहण न होणे. अनिष्ट रसोत्पत्ति. रस धातूच्या दुष्टीमुळे होणाऱ्या लक्षणांपैकी एक लक्षण.

**वैराटक**–पु., कन्दविषभेदः, लक्षणम्–अङ्गदुःखं शिरोरोगश्च जायते ( सुक. २.५ )
कंदविषाचा एक प्रकार. ह्या विषामुळे अंग दुखणे व शिरोरोग होतात.

**वैरान्तक**–पु., वनस्पति० अर्जुनः ( रा. ९.१९१ )
अर्जुनसादडा.

**वैरूप्य**–वि., विरूपस्य भावो नाम विरूपता ( चशा. ८.३२ )
बिरूपता, विद्रूपता, विद्रूप होणे.

**वैरेकीयद्रव्य**–न., विरेको विरेचनम्, विरेकस्येदमिति वैरेकीयं, तच्च द्रव्यम् विरेचनद्रव्यम् ( सुसू. ४४.१२ )
रेचक द्रव्य.

**वैरेचन**–वि., विरेचनोपयोगि विरेचनसम्बन्धि ( सुसू. ४४.५ )
विरेचनाच्या उपयोगी.

**–धूम**–पु., धूमविशेषः असौ दन्तमूलगताधिमांसे वातश्लेष्मजकासे च प्रयोज्यः ( सुचि. २२.२५ )
दोषांचे शोधन करणारा धूम. दाताच्या मुळात उत्पन्न झालेल्या अधिमांस या रोगात आणि वातकफज खोकल्यात हा धूम द्यावयाचा असतो.

**वैरेचनिक**–वि., विरेचनसम्बन्धी ( योगः ) ( सुउ. ४४.१५ )
रेचकयोग, औषध.

**वैरेच्य**–वि., वैरेचनिकः, यथा धूमविशेषः ( चसू. ५.३७ )
दोषांचे शोधन करणारा धूम. पहा 'वैरेचन धूम'.

**वैरोधिकत्व**–न., विरोधकत्वं नाम द्रव्याणां परस्परगुणविरुद्धत्वम् ( चसू. २६.८० )
दोन द्रव्यांमध्ये परस्पर विरोधी गुणवत्व असणे. परस्परगुणांचे विरुद्धत्व.

**वैरोधिकनिमित्त**–वि., विरुद्धाऽशननिमित्तः ( विकारः ) ( चसू. २६.११३ )
परस्पर विरुद्ध असलेल्या द्रव्यांच्या आहारापासून झालेला विकार. जसे–केळी व दूध यांचा नित्य आहार केल्याने उत्पन्न झालेला रोग.

**वैवर्ण्य**–वि., वर्णहीनता ( चनि. ५.७ ) विवर्णता ( सुनि. १.२५ )
मूळ वर्णात बिघाड होणे. मूळ वर्ण नाहीसा होणे, कमी होणे, विकृत वर्ण येणे.

**वैवस्वत**–पु., देवता० यमः ( सुसू. ३१.२४ )
एक देवता. यम.
वि., यमाधिष्ठितः, याम्यः यथा पाशः ( चचि. १(४).६० )
यमाचा पाश.

**–क्षय**–पु., यमगृहम् (चचि. १.(४).६०) यमाचे घर.

**वैवादिक**–वि., विवादं कुर्वाणः विवादे नियुक्तो वा ( चसू. २९.९ )
विवाद करणारा, वादविवाद करण्याकरिता नेमलेला.

**वैशद्य**–वि., अच्छत्वं, पिच्छिलगुणस्य विनाशको गुणविशेषः ( चवि. ८.९८ ) निर्मलता. ( सुचि. २४.९-१० )
पिच्छिल— बुळबुळीतपणा नष्ट करणारा गुण. स्वच्छता, निर्मलता.

**वैशल्य**–न., विगतशल्यत्वं नाम शल्यराहित्यम् ( चशा. ८.३१ )
शल्य काढले आहे असा, शल्यरहित.

**वैशाखी**–स्त्री., वनस्पति० पुनर्नवाभेदः क्रूरः ( रा. ५.४०७ ) द्र० 'पुनर्नवा' पुनर्नवाप्रकार.

**वैशारद्य**–न., पाण्डित्यम् । परवचनाभिभवपाण्डित्यम् ( चवि. ८.१५ )
पांडित्य, दुसऱ्याचे विधान खोडून टाकणारे पांडित्य.

**वैशीजाता**–स्त्री., वनस्पति० पुत्रदात्री ( रा. ३.४७ )
पांढऱ्या सुवासिक फुलांची एक वनस्पती. पुत्र देणारी.

**वैशेषिक**–वि., विशिष्टः, परस्परव्यावृत्तः इति यावत् ( चशा. ४.१४; सुचि. ९.११ )
एकाच्या अपेक्षेने विशिष्ट असलेला. परस्पर भिन्न, वेगळा.

**वैश्मिक**–वि., वेश्म गृहम्, तत्र भवो नाम गृहप्रतिष्ठितः ( चइ. १२.३५ ) घरात असलेला.

**वैश्य**–पु., सर्पजातिः तल्लक्षणम्–अमी सर्पाः कृष्णलोहितवर्णाः, वज्रनिभा धूम्राः पारावताऽऽभाश्च ( सुक. ४.२७ )
एक प्रकारचा सर्प. ह्या जातीचे साप काळे, लाल.

**वैश्रवण**–पु., कुबेरः ( चचि, २३.८१ ) कुबेर.

**वैश्रवणावास**–पु., वनस्पति० वटः ( ध. ५.७६ ) वड.

**वैश्वदेवी**–स्त्री., पूतनाग्रहस्याऽपरं नाम (का–बालग्रहचि.) पूतना ग्रहाचे दुसरे नाव.

**वैश्वरूप**–न., विश्वरूपस्येदम् विश्वरूपसंबन्धि ( असंसू. २२.१० ) विश्वरूपाशी संबद्ध.

**वैश्वरूप्य**–न., नाना प्रकारं रूपं यस्य स विश्वरूपः, तस्य भावः। विश्वरूप्यम् यथा दोषाणाम् ( सुउ. ६१.१८-१९ )
नाना प्रकारचे स्वरूप असणे. अनेक रूपांचा. जसे दोष.

**वैश्वानर**–पु., देवता० अग्निः ( सुसू. ५.२९ )
एक देवता, अग्नि.
**पारदयोग० विष्णुक्रान्ता जेपालं लाङ्गली देवदाली इत्येभ्यो द्विगुणं गन्धकं पारदं चादाय सर्वानेतान् यवक्षारयुक्तचिञ्चाफलक्वाथेन पक्षमात्रं मर्दयेत्, पुटयेच्च। मात्रा–गुञ्जात्रयम्। अनुपानम्–उष्णाम्बु घृतसैन्धवानि च। फलं–गुल्मनाशः** ( र. १८.७४ )
पारा, विष्णुक्रांता इ० द्रव्यांचा गुल्मनाशक योग. यामध्ये विष्णुक्रांता, जयपाळ, कळलावी, देवडांगरी एक भाग. पारा, गंधक दोन भाग, यवक्षारयुक्त चिंचाफल काढ्याने पंधरा दिवस मर्दन करावे. पुट द्यावे. प्रमाण ३ गुंजा. अनुपान–घृतसैंधवाबरोबर किंवा ऊन पाण्याशी गुल्म रोगात द्यावे.
**पारदादियोग० पारदगन्धकताम्रशिलाजतुकान्तलोहचित्रकत्रिकटुकुष्ठनिर्गुण्डीमुसलीवत्सनाभाऽजमोदानां चूर्णं निम्बक्वाथेनैकविंशतिवारं भृङ्गराजरसेन च सप्तवारं मर्दयित्वा ततो गुटिकाः कुर्यात्। अनुपानं मधु। समयो रात्रिः। फलं–जलोदरविनाशः** ( र. १९.३२-३५ )
पारा, गंधक, ताम्र, शिलाजित, कांतलोह, चित्रक, सुंठ, मिरी, पिंपळी, कोष्ठ, निर्गुंडी, मुसळी, बचनाग, अजमोदा, यांचे चूर्ण कडुनिंबाच्या सालीच्या काढ्यात २१ वेळा आणि माक्याच्या रसात ७ वेळा मर्दन करून गोळ्या कराव्या. अनुपान–मध. जलोदरनाशक.

**–पोटली**–पु., **पारदादियोग० पारदगन्धककपर्दभस्मानि गोदुग्धेन संमर्द्य गजपुटे पचेत्। अनुपानं –एकोनविंशतिमरिचानां चूर्णं मधु घृतं च। मात्रा –वल्लम्। पथ्यं–दधिभक्तः घृततक्रौदनो मध्याह्ने; रात्रौ च दुग्धौदनः। परिहारः– विदाहि विदलं भूरिलवणं तैलपाचितं बिल्वं कारवेल्लं वृन्ताकं काञ्जिकं च वर्जयेत्। अयं योगस्तीव्रतरमग्निदीपनः** ( र. १६.१३०-१३७ )
पारदादि द्रव्यांचा अग्निदीपक योग. यामध्ये पारा, गंधक, कपर्दिकभस्म, गाईचे दुधात घोटून गजपुट द्यावे. प्रमाण–१ वालभर एकुणवीस मिऱ्यांचे चूर्णाबरोबर तूप, मध घालून चाटावे. पथ्य– दहीभात, तूपभात, ताकभात दुपारी घ्यावा. रात्री दूधभात खावा. वर्ज ( अपथ्य )– विदाहि, डाळींचे पदार्थ, लवणाधिक्य, तेलात तळलेले, फोडणी दिलेले, बिल्व, कारले, वांगे, आणि कांजी खाऊ नये. उपयोग–तीव्रतर अग्निदीपक.

**वैश्वानरोचित**–वि., **वैश्वानरोचितो नाम अग्निसेवासात्म्यः यथा बाल्हीकादिजनः** ( चचि. ३०.३१६ )
अग्निसेवक; अग्निसंन्निध सतत कार्य करणारा. अग्नीजवळ राहून त्याची सेवा करणारा. अग्नीचे सात्म्य असणारा.

**वैश्वामित्र**–पु., **विश्वामित्रस्याऽपत्यं वैश्वामित्रः सुश्रुतः** ( सुउ. १८.३ ) विश्वामित्राचा पुत्र, सुश्रुत.

**वैषम्य**–वि., **विषमस्य भावः, विषमता** (चसू. १७.५४)
विषमता.
**–गमन**–वि., **विषमावस्थाप्राप्तिः, वृद्धिर्ऱ्हासगमनमिह वैषम्यं ज्ञेयम्** ( ड. चशा. ६.४ )
समत्वनाश. विषम अवस्था प्राप्त होणे. वृद्धि होणे किंवा क्षीणता प्राप्त होणे.

**वैष्किरिक**–वि., **विष्किरस्येदम् वैष्किरिकम् ( मांसादि )** ( अहसू. ६.५४ )
मातींत मिसळलेले अन्न उकरून खाणाऱ्या कोंबडा इत्यादी पक्ष्यांसंबंधी.

**वैष्टम्भ्य**–वि.. **विष्टम्भित्वम्, स्तम्भनम्**(सुसू. ४२.८(१))
स्तंभन.

**वैष्णवी**–स्त्री., **निद्रा विष्णुमायारूपत्वेन विष्णोरियं वैष्णवी इति** ( सुशा. ४.३३ )
विष्णूची जी ती वैष्णवी ( माया )
**वनस्पति० शतावरी** ( रा. ४.४४० ) शतावरी.
**निर्यास० वंशरोचना** ( ध. २.५५ ) वंशलोचन.
**–सेना**–स्त्री., **हरितालम्** ( र. १२.१०४ ) हरताळ.

**वैसर्प**–वि., **विसर्पचिकित्सितोक्तम्** ( सुउ. २६.१४ )
विसर्प रोगाच्या चिकित्सेत सांगितलेले.

**वैस्वर्य**–न., रोग० **विकृतस्वरत्वम्, विकृतस्वरः** ( चसू. ५.३० )
विकृतस्वर.
वि., **विस्वरत्वोत्पादकम्** ( सुसू. ४५.२१०-२११ )
स्वर विकृत करणारे.

**वैहायस**–न., **अन्तरिक्षम्** ( चचि. १२.३१ )
अंतरिक्ष. आकाश.

**वोडिक**–पु., **कोशस्थवर्गे डल्हणेन निर्दिष्टः प्राणिविशेषः** ( ड. सुसू. ४६.१०८ )
कोशात राहाणारा एक प्राणी.

**वोढ्**–पु., **वेष्टिकर्मकरः, परिवेष्टा** ( सुक. १.१७-१८ )
वेष्टन करण्याचे काम करणारा. परिवेष्टनकर्ता.
**वनस्पति० ऋषभः** ( रा. ५.१५७ )
अष्टवर्गांपैकी एक.

**व्यक्त**–वि., **इन्द्रियग्राह्यम्, 'व्यक्तमैन्द्रियकं चैव गृह्यते तद्यदिन्द्रियैः'** ( चशा. १.६२ ) **महदादि तत्त्वम्** ( चशा. १.६० )
इंद्रियद्वारा ज्यांचे ज्ञान होऊ शकते ते. महत् इत्यादी तत्वे.

**–कर्मन्**–वि., **वायुः, प्रकटक्रियोऽव्यक्तो वायुः स्वकर्मोत्पादनेन व्यक्तो भवति तस्माद् व्यक्तकर्मा** ( सुनि. १.७ )
स्वतः अव्यक्त असून त्याची कार्ये व्यक्त असतात असा वायु. वात.

**–गन्धा**–स्त्री., **वनस्पति० गिरिकर्णी** ( रा. ३.१२५ )
पांढरी गोकर्णी, विष्णुक्रांता.
**यूथिका** ( रा. १०.२५१ ) जुई.

**–त्रिवर्ण**–वि., **व्यक्ताः स्फुटाः अक्ष्णोः रक्तशुक्लकृष्णवर्णाः यस्मिन् तद्** ( असंसू. ३.२६ )
डोळ्याचे तांबडा, पांढरा व काळा हे वर्ण अगदी स्पष्ट दिसतात तो रोग.

**–रसता**–स्त्री., **रसनेन्द्रियग्राह्यमधुरादिरसता** ( सुसू. ४५.११ )
गोड, आंबट इत्यादी रस व्यक्त होणे. जिभेला स्पष्ट कळणे.

**–लक्षण**–न., (परिव०) **सुस्पष्टं चिह्नम्** (सुशा.१.२१)
अगदी स्पष्ट कळणारे लक्षण.

**व्यक्ति**–स्त्री., **व्याधिव्यक्तिः** ( सुसू. २१.३६ )
रोग स्पष्ट होणे.

**–दर्शक**–वि., **आकारदर्शकः** ( चक्र. चचि. २४.७३ )
आकार दाखविणारे. योग्यतादर्शक.

**–व्यवसायार्थ**–वि., **पूर्वोक्तार्थवैशद्यहेतुकम्** ( चनि. १.४१ )
पूर्वोक्त अर्थ स्पष्ट करण्याकरिता. अर्थग्रहण, स्मरणादि व्यवसायाकरिता.

**व्यक्तीभाव**–पु., **अभिव्यक्तिः** ( चशा. ८.१९ )
स्पष्टीकरण, व्यक्तीकरण.

**व्यग्र**–वि., **व्याकुलः** ( चसि. २.४ ) व्याकुळ.

**व्यङ्ग**–न., रोग० **क्षुद्ररोगः, रक्तदोषजविकारेष्वेकः; क्रोधाऽऽयासप्रकुपितो वायुः पित्तेन संयुतो मुखमागत्य नीरुजं तनुकं श्यावं मण्डलं विसृजति अतस्तं व्यङ्गमाऽऽदिशेत् ।** ( सुनि. १३.४५-४६ )
**तस्याऽधिष्ठानं द्वितीया लोहिता नाम त्वक्** ( सुशा. ४.४ ) **बहिर्मार्गजो व्याधिः** ( चसू. ११.४९ )
तोंडावर दिसणारे काळे डाग. वांग. हा क्षुद्ररोग आहे. रक्तदोषाचे विकारातील एक. क्रोध, आयास यांनी प्रकुपित झालेला वायु पित्ताच्या सह मुखावर काळे, गोल, न दुखणारे डाग उत्पन्न करतो. यास वांग म्हणतात. ७ त्वचांपैकी लोहिता नावाची दुसरी त्वचा. हे या रोगाचे स्थान. हा बहिर्मार्गज रोग आहे. ( बाह्य भागी झालेला. )

**व्यजन**–न., **तालवृन्तकम्** ( सुसू. ४५.१९ )
ताडाचा पंखा.

**व्यजनानिल**–पु., **तालवृन्तवायुः, तद्गुणाः–अयं शोषदाहश्रमस्वेदमूर्च्छाघ्नः** ( सुचि. २४.८२ )
पंख्याचा वारा. शोष, दाह, थकवा, घाम, मूर्च्छानाशक.

**व्यञ्जन**–न., **भुज्यमानाऽन्नस्य रोचनार्थमार्द्रकलशुनादिना निर्मितं द्रव्यम्** ( र. ५.२२०-२२ )
अन्नाची रुचि लागावी म्हणून आले, लसूण इत्यादि द्रव्यांचा बनविलेला पदार्थ. चटणी, कोशिंबीर इत्यादी.
**चिह्नम्** ( चसू. १८.५ )
दोष, रोग यांचे लक्षण. विकाराचे लक्षण.
**शरीरे व्यज्यमानं श्मश्रुस्तनादि** ( चशा. ४.१४ )
स्तन, दाढी, मिशा इ० स्त्रीपुरुष दर्शक चिन्हे. जन्मानंतरच्या काळात व्यक्त होणारी.

**–केशी**–स्त्री., **वनस्पति० नीलिनी** ( रा. ४.३५० )
नीळ.

**व्यञ्जित**–वि., **प्रकटितम्** ( सुनि. ७.५-६ )
उघड झालेले. प्रकट झालेले,

**व्यतिकर**–पु., **संयोगः मिश्रणम्** ( सुनि. १०.१२ )
मिश्रण. एकत्र करणे. संयोग.

**व्यतिक्रान्तपाक**–वि., **अतिशृतः, अतिपाचितः** ( चसु. २७.२७५ )
अतिशय शिजलेले. अतिशय उकळलेले.

**व्यत्यास**–पु., **विरुद्धक्रमः, परिवर्तनम् क्रियापरिवर्तनम्** ( चचि. १५.१९६ )
उलट क्रिया करणे, क्रियांचा क्रम बदलणे. एका दोषाची चिकित्सा केल्यावर अन्य दोषांची चिकित्सा करणे म्हणजे मागाहून केलेली चिकित्सा पूर्वीच्या चिकित्सेची व्यत्यासचिकित्सा होते.
**अमेलकः, समाहाराभावः** ( चचि. १९.९ )
न मिसळणारे. एकत्र न होणारे. संमीलित न होणारे.
**वैपरीत्यम्** ( सुशा. ६.२७ ) विपरीतत्व.
उलट गुण असणे. विरोधित्व, विरुद्धत्व.

**व्यथन**–न., **वेदनाविशेषः** ( चनि. ८.६ ) पीडा, व्यथा.

**व्यथान्तक**–पु., **वनस्पति० कर्णिकारः** (ध. १.२२१ )
पांगारा, बहावा.

**व्यथापूर्व**–वि., **व्यथापुरःसरः, यस्मिन् व्यथा भवति सः** ( चनि. १.३० )
ज्या विकारात प्रथम वेदना म्हणजे रोग होतो व नंतर दोषदुष्टि होते तो रोग. आगन्तुरोग.

**व्यथितास्य**–वि., **व्यथितमुखः** ( सुशा. ४.६८-७८ )
ज्याचे तोंड विकृत झाले आहे तो. तोंड आलेला.

**व्यध**–पु., **लक्षण० विद्धत्वम्** ( चसू. १७.२९ ) **ताडनमिव मुद्गरादिना** ( अरु. ) **सूचीविद्धस्येव व्यथा** ( हे. अहृसू. १२.४९ )
दांडक्याने मारल्याप्रमाणे, सुया टोचल्याप्रमाणे वेदना.

**व्यधन**–न., **वेधः तीक्ष्णाग्रशस्त्रेण छिद्रीकरणम्** ( सुचि. १.८ ) **शल्यतन्त्रे उपक्रमविशेषः** ( चसू.११.५५ )
तीक्ष्णाग्र शस्त्राने भोक पाडणे (उदरातून पाणी काढण्याकरिता कान टोचणे वगैरे.)

**व्यधनीयप्रदेश**–पु., **व्यधनकर्मयोग्यः प्रदेशः** ( असंसू. ३६.१२ )
भोक पाडण्याची चिकित्सा करण्यास योग्य शरीर–प्रदेश.

**व्यध्य**–वि., **व्यधनीयः, व्यधनकर्मार्हः** ( **व्याधिः** ) ( चचि. २५.५७ )
व्यधनकर्म ज्यात केले पाहिजे असा रोग ( शिराव्यध इ० ).

**व्यन्तर**–पु., **सर्प० दर्वीकरादीनां संकरात् स्त्रीपुंसमिश्रीभावात्समुत्पन्नः सर्पः** ( असंउ. ४१ )
भिन्न जातीच्या नरमादी सर्पसंभोगापासून उत्पन्न झालेला सर्प.

**व्यपगतसंदेह**–वि., **निःसंदेहः संदेहरहितः** ( चसू. २९.७ )
निःशंक, शंकारहित, निःसंदेह.

**व्यपदेश**–पु., **निर्देशः मुख्यव्यवहारः** ( अहृसू. ९.२ )
निर्देश. उल्लेख. मुख्य व्यवहार.

**व्यपरोपित**–वि., **रोपितमात्रः** ( चशा. ६.२६ )
रोपलेले ( झाड ). रोपणे म्हणजे झाड लावणे.

**व्यभिचरण**–न., **एकं परित्यज्य अन्यस्य ग्रहणम्** ( चसू. ८.५ )
घ्यावयाचे ते सोडून दुसरे घेणे, व्यभिचार.
**व्यभिचारः, अनैकान्तिकः हेत्वाऽऽभासः** ( चवि., ८.४५ )
हेत्वाभासाचा एक प्रकार.

**व्यभ्र**–वि., **अनभ्रम्, मेघरहितम्** ( **दिनम्** ) ( सुचि. ६.४ )
निरभ्र ( दिवस ). आभाळ नसलेला. मेघरहित.

**व्यम्ल**–वि., **विदग्धं पक्वापक्वम्** ( अहृसू. २९.४८ )
विशेष अम्ल. अर्धवट पक्व. कांही पचलेले काही न पचलेले ( अन्न ), विदाह करणारे जळजळ करणारे.

**–ता**–स्त्री., **विदाहः** ( चचि.५.३७ )
विदाह, जळजळ, घशाशी आंबट येणे.

**व्यवसाय**–पु., **निश्चयः** ( चवि. ८.४७ ) निश्चय.
**प्रवृत्तिः** ( चवि. ४.८ ) उद्योग, व्यवसाय.
**ज्ञानेन निर्धारणम्** ( सुचि. ३३.९ )
जाणणे, समजणे.

**व्यवसायिन्**–वि., **अयं विषमाऽवस्थास्वपि चिकित्सां कुर्वन्न मुह्यति । अन्ये उत्साहीति मन्यते** ( सुशा. ३४.१९-२० )
चिकित्सेचा–चिकित्साव्यवसायाचा फार अनुभवी. कठीणप्रसंगी न डगमगता चिकित्सा करणारा, उत्साही.

**व्यवस्थित**–वि., **स्थिरम्** ( सुसू. ४०.३ )
स्थिर, अचल.

**व्यवहार**–पु., **शब्दप्रयोगः** ( अहृसू. ९.१५ )
शब्दयोजना.

**व्यवहारोपजीविन्**–वि., **व्यवहारं व्यवहारोपलभ्यं धनादि आलंब्य जीवन्, वृत्तिजीवी** (चवि. ३.२० )
जीवनाकरिता आवश्यक तो पैसा मिळविण्यासाठी व्यवसाय करून त्यावर जगणारा. व्यावहारिक व्यवसायावर उपजीविका करणारा.

**व्यवाय**–पु., **स्त्रीसेवा। विषयोपभोगः, मैथुनम्** ( सुचि. २६.३ )
संभोग, मैथुन.

**–शील**–( परिव० ) वि., **व्यवायी, मैथुनोपसेवी** ( सुचि. २६.११ )
नित्य संभोगसेवी, नित्य मैथुन करणारा.

**–शोष**–पु., **रोग० शोषभेदः, तत्र लक्षणानि शुक्रक्षय-लिङ्गानि पाण्डुदेहत्वं प्रतिलोमं धातुक्षयश्च** ( सुउ. ४१.१७ )
अति मैथुनाने उत्पन्न झालेला शोष–राजयक्ष्मा, क्षय. प्रतिलोमक्षय.

**व्यवायिन्**–वि., **गुण० यत्सर्वं देहं व्याप्य पश्चात्पाकं याति तद्** ( सुउ. ४७.३ )
विशेषगुण. जे द्रव्य प्रथम सर्व शरीर व्यापून नंतर त्याचे पचन होते ते. पचण्याचे अगोदरच सर्व शरीर व्यापणारे द्रव्य.

**व्यसन**–न., **व्याधिः। पीडा** ( चसू. ५.१०० )
पीडा, रोग.
**मरणम्** ( चचि. १५.२३४ ) मरण.
**वस्त्रादीनां स्फुटनादिरूपो अंशः** ( चइ. १२.२७-३० )
वस्त्र फाटणे.
**सर्पपिशाचाद्यभिघातः** ( चसू. ५.९७ )
सर्पदंश, पिशाचाने पछाडणे इत्यादी.
**दुःखम्** ( सुसू. ३५.३७ ) दुःख.

**–सूचक**–वि., **संकटसूचकः (शब्दः)** (चशा. १.११९)
संकट सुचविणारा– शद्ब.

**व्यसनिन्**–वि., **द्यूतमद्यवेश्यादीनि व्यसनानि सन्ति यस्य सः** ( सुचि. ३०.४ )
ज्याला जुगार, दारू, वेश्या इत्यादींचे व्यसन असते तो.
**संकटप्राप्तः** (चइ. १२.२१-२२) संकटात सापडलेला.
**अतिदुःखी** ( असंशा. १२.१३ ) अति दुःखी.

**व्यस्त**–वि., **अन्यत्र गतम्** (चइ. ३.५) दुसरीकडे गेलेला.
**असमस्तम्** ( सुउ. १०.६ ) थोडे.

**–हनु**–वि., **विघटितमुखसंधिः** ( सुशा. १०.९ )
निखळलेली हनुवटी. मुखसंधीपासून ढळलेली हनुवटी.

**व्याकरण**–न., **विवरणम्** ( सुशा. ४.१ )
विवरण. विस्ताराने सांगणे.

**व्याकुल**–परिव० वि., **लक्षण० अस्वस्थचित्तः** ( सुसू. ३.५४ ) अस्वस्थ मनाचा. व्याकुळ.

**व्याकुलित**–वि., **आवृतः** ( सुनि. १.८९ )
झाकलेला, व्यापलेला.

**व्याकृति**–वि., **विकृताकारम्** ( असंशा. १०.५ )
विकृत आकाराचा.

**व्याख्या**–स्त्री., **विवरणम्** ( सुसू.१.३९ )
विवरण. विस्ताराने विवेचन.

**व्याख्यान**–न., **तन्त्रयुक्तिः व्याख्यानं नाम यत्सर्व-बुद्ध्यविषयं व्याक्रियते** ( चसि. १२.४३ )
समजावण्याचा विषय. बुद्धीला आकलन न झालेले सांगितले जाते ते.

**व्याघातक**–पु., **आरग्वधः** ( काखिल. १४ ) बहावा.

**व्याघ्र**–पु., **प्रसहजातीयमृगः** ( चसू. २७.३५) **गुहाशयेष्वेकः** ( सुसू. ४६.७२ ) **तन्मांसगुणाः–मधुरं–उष्णं–स्निग्धं–लघु–दीपनं–बल्यं–वृष्यं रुच्यं वातपित्तघ्नं च** ( ध. ६.३९१ )
वाघ. प्रसह जातीमधील एक प्राणी. मांसाचे **गुण**– मधुर, उष्ण, स्निग्ध, लघु, दीपन, बल्य, वृष्य, रुच्य, वातपित्तशामक आहे.
**वनस्पति० एरण्ड० रक्तैरण्डः** ( ध. १.२९६ )
**द्र० 'एरण्ड'** तांबडा एरंड.

**( व्याघ्री )**-स्त्री., **वनस्पति० कण्टकारी** (अहृसू. १०.३०; ध. १.९५ )
भुइरिंगणी.

**–करज**–पु., **प्राणिजद्रव्य० नखी** ( चक्र. चचि. २६.१८४ )
नखी नावाचे सुगंधी द्रव्य.

**–चर्मन्**–न., **व्याघ्रचर्म** ( असंउ. ४ )
वाघाचे कातडे.

**–तल**–न., **भैषज्य० व्याघ्रनखम्** ( ध. ३.६० )
वाघाचे नख.

**–दंश**–पु., **हिंस्रपशुविशेषस्य व्याघ्रादेः दंशः** ( सुक. ७.४३-४५ ) वाघाचा चावा–दंश.

**-दल**-पु., वनस्पति० एरण्डभेदः, रक्तैरण्डः ( ध. १.२९६ ) द्र० 'एरण्ड' एरंड.

**-नख**-पु., वनस्पति० स्नुही ( रा. ८.३५६ ) त्रिधारी निवडुंग.

**वनस्पति० नखी** ( चचि. १२.७२ ) नखी, वाघनखी, सुगंधीद्रव्य.

**भैषज्य० तद्गुणाः-तिक्तः कषाय उष्णः वर्ण्यः सौगन्ध्यदः कफ-वात-ग्रह-भूत-कच्छु कुष्ठ-व्रण-घ्नश्च** ( ध. ३.६० ) वाघाचे नख. औषध म्हणून उपयोगात आणतात. त्याचे गुण—कफ, वात, दाह, भूतबाधा, खरूज, कुष्ठ आणि व्रण नाशक.

**-पदी**-स्त्री., **वनस्पति० शार्दूलपदिका** ( इन्दुः असंउ. ४४ ) व्याघ्रपदी.

**-पाद्**-पु., **वनस्पति० विकङ्कतः** ( ध. ५.४३ ) वेहकळ.

**वनस्पति० विकण्टकः** ( रा. ११.१९ ) व्याघ्रपदी, निष्कंटकी.

**(-पादी)**-स्त्री., **वनस्पति० विकङ्कतः कण्टकारी** ( र. ११.९० ) रिंगणी.

**-पाद्प्रजा**-स्त्री., **वनस्पति० वन्ध्यकर्कोटकी** ( ध. १.१८६ ) वांझकटोंली.

**-पित्त**-न., **भैषज्य० विषहरद्रव्येष्वेकम्** ( असंसू. ८.२९ ) वाघाचे पित्त.

**-मुखयन्त्र**-न., **व्याघ्रमुखेन सदृशं यस्य मुखं तत् स्वस्तिकयन्त्र०** ( सुसू. ७.१० ) एक यंत्र. वाघाच्या मुखासारख्या आकाराचे यंत्र, स्वस्तिकयंत्र.

**-वसा**-स्त्री., **भैषज्य० नेत्ररोगेष्वञ्जनार्थमुपयुज्यते** ( असंउ. १६ ) वाघाच्या मांसातली चरबी. नेत्ररोगात अंजनासाठी उपयोगी.

**-विष**-न., **लक्षणानि व्यालविषवत् कण्डूनिस्तोदवैवर्ण्यविदाहरागरुक्पाकादीनि भवन्ति** (असंउ. ४६) वाघाचे विष. लक्षणे- खाज, टोचणी, विवर्णता, दाह, लाली, पीडा, व दंशस्थान पिकणे इ०.

**व्याघ्रायुध**-न., **भैषज्य० व्याघ्रनखम्** ( ध. ३.६० ) वाघाचे नख.

**व्याडि**-पु., **सप्तविंशतिसंख्याकेष्वन्यतमो रससिद्धिप्रदायकः** ( र. १.३ ) पाऱ्याची सिद्धि देणारा २७ सिध्दांपैकी एक.

**व्यात्तानन**-वि., **विवृताऽऽस्यम्** ( चचि. २८.१०२ ) उघड्या तोंडाचा-'आ' केलेला.

**व्याधि**-पु., **रोग० विविधं दुःखम् आदधातीति दुखः; कायवाङ्मानसी पीडा, पुरुषस्य दुःखाय संयोगो येषां ते दुःखसंयोगा व्याधय उच्यन्ते** ( सुसू. १.२३-२४;चनि. १.४ ) रोग. नानाप्रकारचे दुःख. काया वाचा मन यांची पीडा. दुःखसंयोग.

**दोषः** ( चक्र. चसि. १०.१८ ) दोष.

**ज्वरः** ( चचि. ३.११ ) ज्वर, ताप.

**वनस्पति० कुष्ठम्** ( ध. ३.४९ ) कोष्ठ.

**-कर्शित**-वि., **व्याधिक्षीणः** ( अहृसू. १४.८ ) रोगाने कृश. रोगाने क्षीण.

**-काल**-पु., **भैषज्यकाल०** ( चचि. ३०.२९६-३१२ ) औषध देण्याचा काल.

**-क्षमत्व**-न., **व्याधिसहत्वम्** ( चसू. २८.७ ) रोग सहन करण्याचे सामर्थ्य.

**-घात**-पु., **वनस्पति० आरग्वधः** ( अहृसू. १५.४५ ) बहावा.

**कर्णिकारः** ( ध. १.२२१ ) बहावा.

**वानीरः** ( रा. ९.१७ ) जलवेतस.

**-घातक** पु., **वनस्पति० आरग्वधः** ( असंचि. १० ) बहावा.

**-जन्मन्**-न., **रोगसंभवः** ( सुशा. १०. २८ ) रोगोत्पत्ति.

**-ज्ञान**-न., **रोगज्ञानम्** ( कासंखि. ३.१६ ) रोगाचे ज्ञान.

**-त्रिक**-न., **व्याधित्रयम्, त्रिविधो व्याधिः, मृदुमध्यतीव्रभेदेन सौम्याऽऽग्नेयवायव्यभेदेन वा** ( चचि. २४.६८ ) रोगांची त्रयी. तीनप्रकारचे रोग. मृदु मध्य आणि तीव्र. तसेच सौम्य आग्नेय व वायव्य अशा प्रकारचे.

**-निग्रह**-पु., **रोगनाशः, रोगप्रतिकारः** ( सुचि. ३८.१४ ) रोगनाश, रोगाचा प्रतिकार.

**-निर्घातकर**-वि., **व्याधिनाशकरम्** (चचि. १(१)१३) व्याधिनाशक. रोगनाशक.

**-प्रतिद्वन्द्व**-वि. **व्याधिप्रत्यनीकम्** ( चसू. ७.४४ ) रोगशत्रु.

**–बल**–न., व्याधेर्बलम् ( ( चसू. १३. ७७ ) रोगबल. **दोषबलं रोगबलं वा** ( सुसू. ३९.१० ) दोषांचे बळ किंवा रोगाचे बळ.

**–भेद**–पु., **रोगप्रकारः** ( सुउ. ४०.१६२ ) दोषांचे प्रकार. रोगांचे प्रकार.

**–मार्दव**–न., **व्याधेर्मृदुत्वम्, मृदुर्व्याधिः** ( अहृसू. १४.१८ ) रोगाचे सौम्यत्व, रोगाचे मार्दव, साधा रोग.

**–मुख**–न., **रोगकारणम्** ( असंसू. १३.३ ) रोगाचे कारण.

**–मोक्ष**–पु., **व्याधिमुक्तिः** ( अहृसू. २९.४३ ) रोग बरा होणे. रोग सुटणे.

**–रिपु**–पु., **वनस्पति० कर्णिकारः** ( रा. ९.३३६ ) बहावा.

**–रूप**–न., **रूप्यते लक्ष्यतेऽनेनेति रूपं लक्षणम्, तेन, रोगलक्षणम्** ( चवि. ७.५ ) रोगाचे स्वरूप, रोगाचे लक्षण.

**–लिङ्ग**–न., **व्याधिलक्षणम्** ( चनि. ८.४३ ) रोगाचे लक्षण, रोगाचे चिन्ह.

**–वश**–पु., **व्याधिबलम् व्याध्यनुरूपम्** ( सुशा. ८.८ ) रोग, रोगाचे बळ यांना अनुसरून, रोगानुरूप.

**–विपरीत**–वि., **व्याधिविरुद्धः** ( असंसू. १२.७ ) रोगाच्या विरुद्ध. रोगाच्या गुणकर्मांच्या उलट गुणकर्मांचे.

**–विपर्यय**–पु., **व्याधिनाशः** ( अहृसू. ८.२३ ) व्याधिनाश, रोगनाश.

**–विभ्रम**–पु., **कोष्ठादिक्षोभः** ( सुचि. ३४.७ ) रोग चाळवणे, अधिक पसरणे. कोष्ठादि अवयवांचा क्षोभ.

**–वेगसमुत्क्रमित**–वि., **व्याधिबलेन अप्रकृतिस्थितः** ( चनि. ७.४ ) रोगाच्या वेगाने–बलाने हैराण झालेला. अस्वस्थ असलेला.

**–संकर**–पु., **व्याधिमेलकः** ( चनि. ८.२६-२९ ) रोगांचे एकत्रीकरण, रोगांचा मेळा. रोगांचे मिश्रण.

**–संस्थान**–न., **व्याधेः लक्षणम्, आकृतिः वा** (अहृसू. १२.६९) रोगाचे लक्षण, रोगाचे स्वरूप.

**–समुत्थान**–न., **व्याधेः उद्भवः** ( चवि. ४.८ ) रोगाचा उद्भव. रोगोत्पत्ति. रोग होणे.

**–समुद्देशीय**–वि., **अध्यायसंज्ञा०** ( सुसू. २४.१ ) अध्यायाचे नाव. यात व्याधीच्या प्रकारांचे वर्णन आहे.

**–समुद्भव**–पु., **व्याध्युत्पत्तिः** ( सुउ. ६१.१९,२१ ) रोगाची उत्पत्ति, रोगाचा जन्म.

**–समूह**–पु., **लक्षणसमूहः** ( चचि. ८.३२ ) रोगांचा समुदाय.

**–सात्म्य**–वि., **उपशयात्मकम्** ( सुशा. १०.२० ) रोगनाशक. रोगाचा नाश करून शरिराशी सात्म्य होणारे.

**–हतमांस**–न., **व्याधिना मृतशरीरस्य मांसम्** ( सुसू. ४६.१२७ ) रोगाने मेलेल्या शरिराचे मांस.

**–हन्**–पु., **वनस्पति० आरग्वधः** ( ध. १.२१९ ) बहावा.

**–हन्तृ**–पु., **वनस्पति० वाराही** ( रा. ७.१३६ ) डुक्करकंद.

**–हर**–न., **भेषजम्** ( चचि. १.३ ) औषध.

**–हेतु**–पु., **रोगहेतुः** ( चनि. ८.२४ ) रोगाचे कारण.

**व्याधित**–पु., **रोगी** (सुसू. ३४.२१-२२ ) रोगी.

**–रूप**–वि., **व्याधितसदृशः** ( चवि. ७.३ ) रोग्यासारखा.

**–रूपीय**–वि., **अध्यायसंज्ञा०** ( चवि. ७.१ ) अध्यायाचे नाव. यात रोगग्रस्त पुरुषाचे व त्या-निमित्त कृमिविकारग्रस्तांचे वर्णन आहे.

**व्याध्यवस्था**–स्त्री., **व्याधेः सामाद्यवस्था** ( अहृसू. १.२४ ) रोगाच्या अवस्था. रोगाच्या अपक्वावस्था, पच्य-मानावस्था, पक्वावस्था इत्यादी.

**व्याध्युपलब्धि**–स्त्री., **रोगस्य ज्ञानम्** ( असंनि. १.७ ) रोगाचे ज्ञान.

**व्याध्युपसृष्ट**–पु., **व्याधियुक्तः, रोगी** ( सुसू. ३४.१५ ) रोगयुक्त, रोगाचा उपसर्ग असलेला.

**व्यान**–पु., **वायुः, व्यानो हृद्यवस्थितः कृत्स्नदेहचरः शीघ्रतरगतिप्रसारणाऽऽकुञ्चनोत्क्षेपाऽवक्षेपनिमिषो-न्मेषणजृम्भणाऽन्नस्वादनस्रोतोविशोधनस्वेदाऽसृक्-स्रावणाऽऽदिक्रियो योनौ च शुक्रप्रतिपादनो विभज्य चान्नस्य किट्टात्सारं तेन क्रमशो धातूंस्तर्पयति** ( असंसू. २०.४; चचि. १५.३६; चचि. २८.९; सुनि. १.१७ )

सर्व शरिरात संचार करणारा वायु. व्यान नावाचा वायु. हृदयामध्ये राहून सर्व देहभर फिरतो. शरिरातील अति शीघ्रगति प्रसारण, आकुंचन, वर फेकणे, खाली फेकणे, डोळ्यांची उघडझाप, जांभई, अन्नाचा आस्वाद घेणे, स्रोतसांचे शोधन. घाम, रक्तस्रावादि क्रिया, शुक्राची उत्पत्ति, अन्नाचे सार किट्ट पृथक्करण व त्यामुळे क्रमशः धातूची समृद्धि करणे.

**–प्रकोप**–पु., **अतिगमनध्यानक्रीडाविषमचेष्टितविरोधिरूक्षभीहर्षविषादाद्यैः प्रकुपितो व्यानः पुंस्त्वोत्साहबलानां भ्रंशं शोफचित्तोत्प्लवज्वरसर्वाऽङ्गरोगनिस्तोदरोमहर्षाङ्गसुप्तत्वकुष्ठविसर्पादीन् सर्वाङ्गगव्याधींश्च करोति** ( असंनि .१६.२५-२६ )
व्यानवायूचा प्रकोप— दुष्टि. अतिप्रवास, चिंतन, खेळ, वेडेवाकडे हावभाव, विरुद्ध गुणाचे रूक्ष पदार्थभक्षण, भीति, अतिहर्ष, विषभक्षण वा संसर्गामुळे प्रकुपित झालेला व्यानवायु पौरुष, उत्साह आणि बलाचा नाश करतो. सूज, मानसिक ज्वर, सर्वांगरोग टोचणी, रोमांच येणे, त्वचेला बाधिर्य, कुष्ठ, वीसर्प वगैरे विकार उत्पन्न करतो.

**व्यापद्**–स्त्री., **अन्यथाऽऽपत्तिः** ( सुसू. १५.२७ )
वाईट प्रकारे बदल होणे; बदल ( अनिष्ट ) होणे.
**संकटम्** ( सुचि. ३४.१ ) संकट.
**व्याधिः** ( चसू. १५.३ ) रोग.
**विकृतिः, विकारः** ( चसू. १३.७ ) रोग, विकार.

**व्यापन्न**–वि.,
**दोषाऽऽक्रान्तम्** ( सुसू. ४५.११ )
दोषांनी व्यापलेले, दोषग्रस्त.
**विकृतम्** ( सुनि. १.४; चसू. १५.३ )
विकृत, बिघडलेले.

**व्यापाद**–पु., **प्राण्युपघातचिन्ता परानिष्टचिन्तनम्** ( अहसू. २.२२ )
प्राण्याचा नाश करण्याचा विचार. दुसऱ्यांचे वाईट इच्छिणे.

**व्यापादन**–( परिव० ) न., **हिंसनम्** ( सुनि. ७.४४; सुसू. १२.१६ )
नाश करणे, ठार मारणे.

**व्यापार**–पु., **कर्म** ( असंनि. १५.६) कर्म. क्रिया.

**व्यापिन्**–न., **व्यापकः** ( अहसू. १.७ )
व्यापणारा, व्यापक.

**व्याप्ति**–स्त्री., **व्यापकता** ( अहसू. ६.५२.८-७ )
**सर्वस्रोतोऽनुसरणम्** ( हे. ८. ५२ )
व्यापकता. सर्व स्रोतसात संचार असणे.

**व्याप्य**–न., **वनस्पति० कुष्ठम्** ( असंसू. ३.१६ )
कोष्ठ–कोळिंजन.

**व्याभुग्न**–वि., **वक्रम्** ( असंशा. ४.३८ ) वाकडे.

**व्याम**–पु., **तिर्यग्विस्तृतबाहुद्वयप्रमाणम्** (चसू. १४.४३)
दोन्ही हात आडवे पसरल्यानंतर एका हाताच्या मधल्या बोटाच्या टोकापासून दुसऱ्या हाताच्या मधल्या बोटाच्या टोकापर्यंतच्या लांबी इतके प्रमाण. वाव.

**व्यामार्धमात्रा**–स्त्री., **अर्धव्यामप्रमाणम्** (सुचि. ३२.७ )
अर्धी वाव, अर्ध्या वावेइतके.

**व्यामिश्र**–वि.. **संमिश्रम्** ( अहसू. ६.५४ )
मिसळलेले, संमिश्र.

**व्यायच्छमान**–वि., **व्यवायं आचरतः** ( चनि. ६.८ )
नित्य संभोग करीत असतां.

**व्यायाम**–पु., **शरीराऽऽयासजननं कर्म, शरीरचेष्टा** ( अहसू. २.१० ) **कर्म० स्थैर्यकराणां श्रेष्ठः** ( चसू . २५.४० ) **अनग्निस्वेदः** ( सुचि. ३२.१५ ) **व्यायामाच्छरीरस्य सम्यक्पुष्टिः, सुघटितत्वं, कान्तिः, अग्निदीप्तता, अनाऽऽलस्यं, स्थिरत्वं लाघवं, मृजा– (शुद्धिः), श्रमक्लमपिपासोष्णशीतादीनां सहिष्णुता, आरोग्यञ्चोपजायते । व्यायामसदृशं स्थौल्याऽपकर्षणं किंचिन्नास्ति । व्यायामिनोऽरिभयं नास्ति । व्यायामी सहसा जरां न प्राप्नोति । तस्य मांसं स्थिरीभवति । व्यायामस्विन्नगात्रस्य पद्भ्यामुद्वर्तितस्य व्याधयो न भवन्ति । वयोरूपगुणैर्हीनाऽपि पुरुषाः व्यायामेन सुदर्शना भवन्ति । व्यायामिनो विरुद्धं भोजनं विदग्धमविदग्धं वाऽन्नं निर्दोषं पच्यते । बलिनां स्निग्धभोजिनां च व्यायामः सदा पथ्यो भवति । व्यायामादग्निदीप्तौ सत्यां सर्वरोगोपशमः** ( सुचि. २४.३८-४५ ) **अतिव्यायामजा रोगाः–क्षयस्तृष्णाऽरुचिश्छर्दिः रक्तपित्तं भ्रमः क्लमः कासः शोषः ज्वरः श्वासश्च** ( सुचि. २४.४९-५० ) **वर्षाकाले मृदुव्यायाममाचरेदित्युक्तम् । स च शरीरक्लेशदोषशोषाऽर्थं वह्निसंधुक्षणार्थं च** ( सुउ. ६४.६-१० )
शरिराला श्रम घडविणारी कृति म्हणजे व्यायाम शरीरस्थैर्यकर सर्व उपायात श्रेष्ठ. अग्नीशिवाय

घाम आणण्याचे कार्य करणारा; याने शरीर डौलदार, पुष्ट व कांतिमान होते; जठराग्नि प्रदीप्त होतो; आळस नाहीसा होतो; शरिराला हलकेपणा येतो; स्रोतसे शुद्ध होतात. श्रम, तहान, उष्ण, शीत इत्यादी गोष्टी सहन होतात. स्थूलता नाहीसे करणारे याच्यासारखे दुसरे काहीही नाही. व्यायाम करणाऱ्याला शत्रूचे भय नसते. व्यायाम करणारा एकाएकी म्हातारा होत नाही. मांस स्थिर होते. व्यायामाने घाम येऊन गेल्यावर पायाने अंग चेपून घेणाराला रोग होत नाहीत. वयाने, रूपाने निकृष्ट असणाऱ्यांना सुद्धा व्यायामाने सौंदर्य येते. यांना विरुद्धान्न, अविदग्ध, विदग्ध सर्व तऱ्हेचे अन्न पचते. शरिराला बाधत नाही. बलवान व स्निग्ध अन्न सेवन करणारांना व्यायाम नेहेमी हितावह होतो. अतिव्यायामाने क्षय, तृष्णा, अरुचि, ओकारी, रक्तपित्त, भ्रम, ग्लानि, खोकला, ज्वर, श्वास, इत्यादी विकार होतात. वर्षाकालामध्ये थोडा व्यायाम घ्यावा. ज्यामुळे शरीराला घाम येऊन अग्नि प्रदीप्त होईल.

**विस्तारः** ( चशा. ८.४५ )

विस्तार, फैलाव.

**–कर्मन्**–न., **कर्म० धनुराकर्षणनियुद्धप्रभृतिः** ( सुउ. ५०.४ )

धनुष्य ओढणे, युद्ध करणे इत्यादी. नमस्कार, जोर बैठका इत्यादी व्यायाम कर्म होय.

**–नित्य**–वि., **व्यायामकर्म नित्यं यस्य सः नित्यव्यायामी** ( चसू. १३.५२ )

नित्य व्यायाम करणारा.

**–नियम**–पु., **नित्यव्यायामः । स्निग्धभोजिनां बलिनां पुरुषाणां कृते व्यायामस्तु सदैव हितकरः. आत्महितैषिभिर्जनैः सर्वेष्वृतुष्वहरहः स्वबलार्धेन व्यायामः कर्तव्योऽन्यथा स एव व्यायामो मनुजं हन्यात्, यावत्कालपर्यन्तं हृदि स्थितो वायुर्वक्त्रतां न प्रपद्यते तावत्कालपर्यन्तमेव व्यायामः करणीयः, ' हृदि स्थानस्थितो वायुर्यदा वक्त्रं प्रपद्यते । व्यायामं कुर्वतो जन्तोस्तद्बलार्धस्य लक्षणम् ॥ ' वयोबलशरीरकालाशनदेशाऽनुसारेणैव व्यायामः कर्तव्योऽन्यथा स एव व्यायामः व्याधिजनकः स्यात्** ( सुचि. २४.४५-४९ )

दररोज नियमाने केलेला व्यायाम–स्निग्ध भोजन करणाऱ्या, बलवान पुरुषांना सदा सर्वदा हितकारक आहे. व्यायामाचे सर्व तऱ्हेचे फायदे ज्यांना पाहिजे असतील त्यांनी सर्व ऋतूत नियमाप्रमाणे व्यायाम करावा. व्यायामाने शरीर थकून जाईल इतका करू नये. अर्धी शक्ति शिल्लक आहे तोच व्यायाम थांबवावा. तसे न केल्यास तो मनुष्याचा घात करतो. अर्धशक्ति व्यायाम लक्षणे–हृदयात असलेला वायु जेव्हा तोंडातून बाहेर येऊ पाहतो तेव्हा अर्धशक्ति व्यायाम झाला असे समजावे. वय, बल, शरीर, काल, आहार, देश यांच्या तारतम्याने व्यायाम किती, केव्हा आणि कोणी करावा हे ठरवावे.

**–शक्ति**–स्त्री., **शरीराऽऽयासजननं कर्म व्यायामस्तत्करणे सामर्थ्यम्** ( चवि. ८.१२१ )

शरिराला थकवा आणणारे कर्म म्हणजे व्यायाम आणि तो व्यायाम करण्याचे सामर्थ्य असणे ती व्यायामशक्ति.

**–शोष**–पु., **शोषभेदः, तल्लक्षणानि–व्यायामशोषी स्रस्ताङ्गः, संभृष्टपरुषच्छविः, प्रसुप्तगात्राऽवयवः, शुष्कक्लोमगलाऽननः, पीतरक्ताऽसिताऽरुणच्छर्दिः, संतप्तवक्षा अत्यर्थदूयनात्परिताम्यन्दुर्गन्धवदनोच्छ्वासः भिन्नवर्णस्वरश्च स्यात्** (सुउ. ४१.२२)

व्यायाम अधिक केल्याने उत्पन्न होणारा शोष. त्याची लक्षणे. – अंग गळणे, शरिरावर भाजून निघाल्यासारखी काळसर कांती, अवयवांना बधिरता, पिपासा स्थान, गळा व तोंड सुकणे, पिवळी तांबडी काळी-तांबूस वांती होणे, छाती तापणे, श्वास कोंडल्यासारखे होऊन अंधेरी येणे, तोंडाला दुर्गंध येणे, श्वासोच्छ्वासालाही दुर्गंध येणे आणि कांती नष्ट होऊन आवाज फुटणे.

**–सात्म्य**–वि., **व्यायामेन सात्म्यम्** (सुसू. ३५.३९)

ज्याला व्यायाम मानवला आहे.

**व्यायामायोग्य**–वि., **व्यायामं कर्तुमयोग्यः, यथा–रक्तपित्ती कृशः शोषी श्वासकासक्षयाऽऽतुरो भुक्तवान्व्यवायक्षीणो भ्रमाऽऽर्तश्च** ( सुचि. २४.५०-५१ )

व्यायाम करण्याला अपात्र–अयोग्य. व्यायाम ज्याला मानवणार नाही असा. रक्तपित्तविकारी, कृश, श्वासी, कासी, क्षयी, नुकताच जेवलेला, स्त्रीसमागमाने क्षीण झालेला, आणि भोवळ येत असलेला, यांनी व्यायाम करू नये.

**व्यायोजिम**-पु., **बन्ध० पञ्चदशकर्णबन्धाकृतिष्वेकः स च स्थूलाणुसमविषमपालिः** ( सुसू. १६.१० )
कानाला बांधावयाच्या पंधरा बंधाकृतींपैकी एक. तो मोठा, लहान किंवा कानाच्या पाळीच्या सम विषम स्थितीला अनुसरून बांधण्यासाठी करायचा असतो.

**व्याल**-पु., **हिंस्रपशुः** (चचि. २३.१७६) **यथा शृगालाऽश्वतराऽश्वऋक्षद्वीपिव्याघ्रवृकादिर्दंष्ट्राप्रहारिणः** ( असंउ. ४६ )
**सर्पः** ( ड. सुउ. ६२.१७ )
क्रूर पशु. कोल्हा, खेचर, घोडा, अस्वल, हत्ती, वाघ, लांडगा, इ० पशु व सर्प वगैरे दंश करणारे प्राणी.
**वनस्पति० चित्रकः** ( धनि. २.८० ) चित्रक.
**क्षीरविष०** ( असंउ. ४० )
विषारी दूध. हिंस्र पशूंचे दूध.

-**खड्ग**-पु., **भैषज्य० व्याघ्रनखम्** (रानि. १२.१११)
वाघाचे नख.

-**गन्धा**-स्त्री., **वनस्पति० नाकुली** ( रानि. ७.१५३ )
मुंगुसवेल.

-**जिह्वा**-स्त्री., **वनस्पति० बला** ( रानि. ४.४३२ )
चिकणा.

-**दंश**-पु., **व्यालादीनां दंशनम्, तल्लक्षणानि-हृच्छिरोरुग्ज्वरस्तम्भतृषामूर्च्छाः** ( चचि. २३.१७६)
हिंस्र पशूंचा चावा. **त्याची लक्षणे**— हृदय, डोके, यांची पीडा. ताप, अवष्टंभ, तहान, मूर्च्छा.

-**दंष्ट्र**-पु., **वनस्पति० गोक्षुरः** ( धनि. १.१०३ )
गोखरू.

-**दंष्ट्रक**-पु., **व्यालदंष्ट्रः** ( धनि. १.१०३ ) गोखरू.

-**नख**-पु., **भैषज्य० व्याघ्रनखम्** (रानि. १२.१११)
वाघनख, वाघाचे नख.

-**पत्रा**-स्त्री., **वनस्पति० उर्वारुः** ( धनि. १.१७६ )
एक प्रकारची काकडी.

-**पाणिज**-पु., **भैषज्य० व्याघ्रनखम्** ( रानि. १२.१११ ) वाघनख, वाघाचे नख.

-**बल**-पु., **भैषज्य० व्याघ्रनखम्** (रानि. १२.१११)
वाघनख, वाघाचे नख.

-**विष**-न., **हिंस्रपशूनां विषम्, एतेन कण्डूनिस्तोदवैवर्ण्यसुप्तिक्लेदज्वरभ्रमाः विदाहरागरुक्पाकाः शोफग्रन्थिविकुञ्चनं दंशाऽवदरणं स्फोटाः कर्णिका मण्डलानि च भवन्ति। निर्विषे दंशे एतद्विपरीतं लिङ्गं नाम कण्डूनिस्तोदाद्यभावः** ( असंउ. ४६ )
वाघ इत्यादी पशूंचे विष. या विषाने खाज, ठणका, वैवर्ण्य, त्वचा बधिर होणे, क्लेद, ज्वर, भ्रम, विदाह, लाली, व्रणामध्ये पू होणे, सूज, ग्रंथि आकुंचित होणे, दंशस्थाने फाटल्यासारखी पीडा, फोड, चकंदळे उत्पन्न होतात. निर्विष दंश असेल तर याचे उलट कंडू, टोचणी इ० नसतात.

**व्यालाचार्य**-पु., **रसरत्नसमुच्चयकृदुद्दिष्टानामन्यतमः प्राचीनो रसाचार्यः** ( र. ६.४९-५३ )
प्राचीन रसाचार्य. रसरत्नसमुच्चयग्रंथात वर्णिलेल्या आचार्यांपैकी एक.

**व्यालायुध**-पु., **भैषज्य० व्याघ्रनखम्** ( रानि. १२.१११ ) वाघाचे नख.

**व्यालीढ**-न., **सर्पदंशभेदः, अयं निर्विषो भवति** ( असंउ. ४१ )
सर्प चावल्यानंतर दाताच्या एक किंवा दोन चावण्याच्या खुणा दिसल्या आणि त्यातून रक्त बाहेर येत नसेल तर त्या दंशाला व्यालीढ म्हणतात. या दंशाने विषबाधा होत नाही. हा दंश निर्विष असतो.

**व्यालुप्त**-न., **सर्पदंशभेदः, अयं सविषः** ( असंउ. ४१ )
सर्प चावल्यानंतर रक्त येत असलेली दोन किंवा तीन छिद्रे आढळली, त्यातून सारखे रक्त वहात असेल तर त्या दंशाला व्यालुप्त म्हणतात. हा सविष असतो. यात विषबाधा होते.

**व्यावर्तक**-पु., **वनस्पति० चक्रमर्दः** ( धनि. ४.५ )
तरोटा.

**व्यावर्तन**-न., **यन्त्रकर्म०** ( अहसू. २५.४१ )
एक यंत्रकर्म.

**व्याविग्न**-वि., **उद्विग्नः** ( सुउ. ६०.१५ )
उद्विग्न.

**व्याविद्ध**-वि., **वक्रम्** ( सुउ. ७.१८-१९ ) वाकडे.

**व्यावृत्ति**-स्त्री., **उद्वृत्तिः यथा चक्षुषोः** (सुचि. ३४.१२)
बाहेर येणे ( डोळे वगैरे ).

**व्यास**-पु., **विस्तारः** ( चसू. ३०.१८ ) विस्तार.

-**योगिन्**-वि., **अमेलकयोगिन्** ( चसू. १३.२७ )
विस्तारयुक्त. ज्यात मिसळलेला नाही असा. वेगळा.

**व्याहन्यमान**-वि., **अवरुध्यमानः** ( सुउ. ५५.४ )
अवरोध केलेले. रोकलेले. अडवलेले.

**व्याहार**-पु., **उक्तिः** ( असंशा. ८.१६ ) तोंडाने बोलणे.

**व्याहृति**–स्त्री., **उच्चारणम्; यथा भूर्भुवःस्वरादिः** ( काजातिसूत्रीय. ८ )
भूर्भुवःस्वः इत्यादी उच्चारणे. मंत्रोच्चारण. मंत्र.

**व्युपद्रव**–वि., **विगताः उपद्रवा यस्य सः, उपद्रवरहितः** ( सुचि. २.५५ )
ज्याचे उपद्रव नाहीसे झाले आहेत असा ( रोग ). उपद्रवरहित.

**व्युषित**–वि,, **विशेषेणोषितम्** ( सुसू. ४६.४७५-७७; अहृसू. ५.१८ )
बराच वेळ ठेवलेले. शिळे.
**रात्रिमतिक्रान्तम्** ( चक. १.१४ )
एक रात्र उलटलेले.

**व्युष्टा**–वि., **परिसमाप्ता ( रात्रिः )** ( चवि. ७.१६ )
संपलेली ( रात्र–पहाट ).

**व्युष्टाजीर्ण**–न., **रोग० प्रभातकालिकमजीर्णम्** ( काखिल. ५.६१ )
सकाळी वाटणारे अजीर्ण. रात्रीचे अजीर्ण.

**व्यूढ**–वि., **विशालम्** ( सुचि. ३८.३ )विशाल, रुंद.
**( व्यूढा )**–वि., **शोभनोन्नता ( शय्या )** ( सुचि. ३८.३ )
प्रशस्त, विशाल ( शय्या ). दिसावयाला चांगली व थोडी उंच.

**व्यूह**–पु., **समूहः** ( चवि. ६.११ ) समूह.

**व्यूहन**–न.. **( मांसादीनां ) यथास्थानं स्थापनम्** ( अहृसू. २५.३१ )
मांसादिकांची उचित–योग्य रचना.
**छित्त्वोत्तुण्डितस्योद्धरणार्थमूर्ध्वीकरणम्** ( ड. सुसू. ७.१४ )
बाहेर असलेल्या शल्याजवळ त्वचेचा भाग कापून ते शल्य काढण्याकरिता, ते धरून वर करणे–वर उचलणे.

**व्योमन्**–न., **महाभूत० आकाशम्** ( सुशा. १.४ )
महाभूतांपैकी एक. आकाश.
**खनिज० अभ्रकम्** ( रानि. १३. २ ) अभ्रक.

**( व्योम )–वल्लिका**–स्त्री., **वनस्पति० खवल्लीः** ( रापरि. ३.१९ )
आकाशवेल.

**व्योमोदक**–न., **भैषज्य० दिव्योदकम्** ( रानि. १४.३२० )
पावसाचे पाणी. अकाशातून पडलेले पाणी.

**व्योष**–पु., न., **त्रिकटु यद्वा शुण्ठीमरीचपिप्पल्यः नागरमरीचपिप्पल्यः** ( चसू. १३.८४; ध. ७.६ )
सुंठ, मिरी, पिंपळीचे मिश्रण.

**–गर्भ**–वि, **व्योषः गर्भे यस्य तत्** ( असंसू. २५.७४ )
सिद्ध करावयाच्या तुपात योग्य प्रमाणात व्योषाची चटणी घालून ते सिद्ध करावयाचे तेव्हा व्योष हा त्या तुपाचा गर्भ म्हटला जातो. सिद्ध करावयाच्या तुपात तूप, काढा इत्यादी द्रव पदार्थ असतात व मध्ये **घन पदार्थ— ( गर्भ )** फक्त चटणी ( येथे व्योष ) असते.

**व्रण**–पु., **वृणोतीति व्रणः अथवा रूढेऽपि व्रणवस्तु न नश्यतीति व्रणः** ( सुसू. २१.४० ) **द्वौ व्रणौ भवतः–शारीर आगन्तुश्च । तयोः शारीरः पवनपित्तकफशोणितसंनिपातनिमित्तः; आगन्तुरपि पुरुषपशुपक्षिव्यालसरीसृपप्रपतनपीडनप्रहाराऽग्निक्षारविषतीक्ष्णौषधशकलकपालशृङ्गचक्रेषुपरशुशक्तिकुन्ताद्यायुधाभिघातनिमित्तः । सर्वस्मिन्नेवाऽऽगन्तुव्रणे तत्कालमेव प्रसृतस्य क्षतोष्मणः उपशमार्थं पित्तवच्छीतक्रियावचारणविधिविशेषः सन्धानार्थं च मधुघृतप्रयोग इत्येतद्विकारणोत्थानप्रयोजनम्, उत्तरकालं तु दोषोपप्लवविशेषाच्छारीरवत् प्रतीकारः । दोषोपप्लवविशेषः पुनः समासतः पञ्चदशप्रकारः, प्रसरणसामर्थ्यात् यथोक्तो व्रणप्रश्नाधिकारे; शुद्धत्वात् षोडशप्रकार इत्येके । तस्य लक्षणं द्विविधं–सामान्यं, वैशेषिकं च । तत्र सामान्यं लक्षणं रुक्स्वरूपम् ' व्रण ' गात्रविचूर्णने, व्रणयतीति व्रणः । विशेषलक्षणं पुनर्वातादिलिङ्गविशेषरूपम् । तत्र वातात् श्यावारुणाभस्तनुः शीतः पिच्छिलोऽल्पस्रावी रूक्षश्चटचटायनशीलः स्फुरणायामतोदभेदवेदनाबहुलो निर्मांसश्चेति । पित्तात् क्षिप्रजः पीतनीलाभः किंशुकोदकाऽऽमोष्णस्रावी दाहपाकरागविकारकारी पीतपिडकाजुष्टश्चेति । कफात् प्रततचण्डकण्डूबहुलः स्थूलौष्ठः स्तब्धसिरास्नायुजालाऽवततः कठिनः पाण्डुवभासो मन्दवेदनः शुक्लशीतसान्द्रपिच्छिलास्रावी गुरुश्चेति । रक्तात् प्रवालदलनिचयप्रकाशः कृष्णस्फोटपिडकाजालोपचितस्तुरङ्गस्थानगन्धिः सवेदनो धूमायनशीलो रक्तस्रावी पित्तलिङ्गश्चेति । वातपित्ताभ्यां तोददाहधूमायनप्रायः पीतारुणाभस्तद्वर्णस्रावी चेति । वातश्लेष्मभ्यां कण्डूयनशीलः**

सनिस्तोदो रूक्षो गुरुर्दारुणो मुहुर्मुहुः शीतपिच्छिलाल्पस्रावी चेति । वातशोणिताभ्यां रूक्षस्तनुस्तोदबहुलः सुप्त इव च रक्ताऽरुणाभस्तद्वर्णाऽऽस्रावी चेति । पित्तशोणिताभ्यां घृतमण्डाभो मीनधावनतोयगन्धिर्मृदुर्विसर्प्युष्णकृष्णस्रावी चेति। श्लेष्मशोणिताभ्यां रक्तो गुरुः, स्निग्धः पिच्छिलः कण्डूप्रायः स्थिरो सरक्तपाण्डुस्रावी चेति। वातपित्तशोणितेभ्यः स्फुरणतोददाहधूमायनप्रायः पीतस्तनुरक्तस्रावी चेति । वातश्लेष्मशोणितेभ्यः कण्डूस्फुरणचुमचुमायमानप्रायः पाण्डुघनरक्तास्रावी चेति । पित्तश्लेष्मशोणितेभ्यः दाहपाकरागकण्डूप्रायः पाण्डुघनरक्तास्रावी चेति । पवनपित्तकफेभ्यः त्रिविधवर्णवेदनास्रावविशेषोपेतः। पवनपित्तकफशोणितेभ्यः निर्दहननिर्मथनस्फुरणतोददाहपाकरागकण्डूस्वापबहुलो नानावर्णवेदनास्रावविशेषोपेतश्च । जिह्वातलाभः सुव्यवस्थितो निरास्रावश्चेति शुद्धो व्रण इति । व्रणवर्णाः– भस्मकपोताऽस्थिवर्णः परुषोऽरुणः कृष्ण इति मारुतजस्य; नीलः पीतो हरितः श्यावः कृष्णो रक्तः पिङ्गलः कपिल इति रक्तपित्तसमुत्थयोः; श्वेतः स्निग्धः पाण्डुरिति श्लेष्मजस्य; सर्ववर्णोपेतः सान्निपातिक इति ( सुसू. २२.१२ ) दुष्टव्रणलक्षणानि–अतिसंवृतोऽतिविवृतोऽतिकठिनोऽतिमृदुरुत्सन्नोऽवसन्नोऽतिशीतोऽत्युष्णः कृष्णरक्तपीतशुक्लादीनां वर्णानामन्यतमवर्णो भैरवः पूतिपूयमांससिरास्नायुप्रभृतिभिः पूर्णः पूतिपूयास्राव्युन्मार्ग्युत्सङ्ग्यमनोज्ञदर्शनगन्धोऽत्यर्थं वेदनावान् दाहपाकरागकण्डूशोफपिडकोपद्रुतोऽत्यर्थं दुष्टशोणितास्रावी दीर्घकालानुबन्धी चेति ( सुसू. २२.७ ) व्रणारिष्टानि–मुमूर्षूणां व्रणाः मद्यागुर्वाज्यसुमनःपद्मचन्दनचम्पकगन्धाः श्ववाजिमूषिकध्वाङ्क्षपूतिवल्लूरमत्कुणगन्धाः पङ्कगन्धाश्च स्मृताः । पित्तवर्णे सति पित्तवेदनाभूतानां दाहादीनाम् अभावश्चेत्तद् वैकृतं वर्णस्य ज्ञेयम्; यः कफनिमित्तः कण्डूमान् स्थिरः श्वेतः स्निग्धस्तस्य दाहरुजे वर्णवैकृतम् । यः वातजः कृष्णः तनुस्रावी मर्मतापी किन्तु स्वल्पमपि रुजं न करोति, तं परिवर्जयेत् । ये व्रणाः क्ष्वेडन्ति ज्वलन्ति, घुर्घुरायन्ते, त्वङ्मांसस्थाश्च सशब्दं पवनं विसृजन्ति; ये च मर्मस्वसंभूता अत्यर्थं वेदनाः जनयन्ति, ते गर्हिताः । ये व्रणाः अन्तः अत्यर्थं दह्यन्ते, बहिःशीताश्च भवन्ति तथा ये बहिरत्यर्थं दह्यन्ते अन्तश्च शीतलाः भवन्ति, तान् परिवर्जयेत् । येषु व्रणेषु ध्वजपताकादण्डाः शोभन्ते प्रासादाकृतिश्च प्रतिभाति तथा ये चूर्णावकीर्णा इव भान्ति, तान् परिवर्जयेत् । येषां मर्मसु व्रणाः प्रवृद्धपूयरुधिरास्तथा ये प्राणमांसक्षयश्वासकासाऽरोचकपीडिताः सन्ति तान् परिवर्जयेत् । ये व्रणाः सम्यगारब्धाः क्रियाभिर्न सिध्यन्ति, तानपि वर्जयेत् ( सुसू. २८.१०-२१ ) शुद्धव्रणलक्षणानि– त्रिभिर्दोषैरनाक्रान्तः श्यावौष्ठः, समः, पिडकी, अवेदनः निरास्रावश्च ( सुसू. २३.१८ ) रोहद्व्रणलक्षणानि– यस्यान्ताः क्लेदवर्जिताः कपोतवर्णप्रतिभाः स्थिराश्च पिटिकावन्तः स रोहतीति आदिशेत् ( सुसू. २३.१९ ) सम्यग्रूढव्रणलक्षणानि– यं समतलं त्वक्वर्णं रूढवर्त्मानमग्रन्थिमशूनमरुजं, तं व्रणं सम्यग्रूढमिति विद्यात् ( सुसू. २३.२० )

तस्य व्रणस्य षष्टिरुपक्रमा भवन्ति । तद्यथा– अपतर्पणमालेपः परिषेकोऽभ्यङ्गः स्वेदो विम्लापनमुपनाहः पाचनं विस्रावणं स्नेहो वमनं विरेचनं छेदनं भेदनं दारणं लेखनमेषणमाहरणं व्यधनं विस्रावणं सीवनं सन्धानं पीडनं शोणितास्थापनं निर्वापणमुत्कारिका कषायो वर्तिः कल्कः सर्पिस्तैलं रसक्रियाऽवचूर्णनं व्रणधूपनमुत्सादनमवसादनं मृदुकर्म पाण्डुकर्म प्रतिसारणं रोमसञ्जननं लोमापहरणं बस्तिकर्मोत्तरबस्तिकर्म बन्धः पत्रदानं कृमिघ्नं बृंहणं विषघ्नं शिरोविरेचनं नस्यं कवलधारणं धूमो मधु सर्पिर्यन्त्रमाहारो रक्षाविधानमिति । तेषु कषायो वर्तिः कल्कः सर्पिस्तैलं रसक्रियाऽवचूर्णनमिति शोधनरोपणानि, तेष्वष्टौ शस्त्रकृत्याः; शोणितास्थापनं क्षारोऽग्निर्यन्त्रमाहारो रक्षाविधानं चोक्तानि, स्नेहस्वेदनवमनविरेचनबस्त्युत्तरबस्तिशिरोविरेचननस्यधूमकवलधारणान्यन्यत्र वक्ष्यामः; यदन्यदवशिष्टमुपक्रमजातं तदिह वक्ष्यते ( सुचि. १.१.९ ) कुष्ठिनां विषजुष्टानां शोषिणां मधुमेहिनां च व्रणाः कृच्छ्रेण सिध्यन्ति (असंउ. २९) चरके विंशतिर्व्रणाः– कृत्योऽकृत्यो–दुष्टोऽदुष्टो– मर्मस्थितोऽमर्मस्थितः– संवृतोऽसंवृतो–दारुणोऽदारुणः– स्राव्यस्रावी–सविषो–निर्विषो–विषम-

स्थित समस्थित उत्सङ्ग्यनुत्सङ्ग्युत्सन्नोऽवसन्नः इति ( चचि. २५.२०-२१ ) शुध्दव्रणलक्षणम्– नातिरक्तो नातिपाण्डुर्नातिश्यावो ऽल्पवेदनायुक्तो नोत्सन्नो न चोत्संगी रोप्यश्चेति ( चचि. २५.८६ ) अशुद्धव्रणलक्षणम्–स पूतिगन्धो विवर्णो बहुस्रावो महारुक्चेति ( चचि. २५.८३ ) तत्र श्यावः स्तब्धः कठिनसंस्पर्शो मंदस्रावस्तीव्रवेदनायुक्तः व्रणो मारुतसंभवः ( चचि. २५.११ ) तृष्णा–मोह-ज्वरस्वेददाहदुष्टयवदारणयुक्तः पूतिस्रावगन्धश्च व्रणः पित्तसम्भवः ( चचि. २५.१३ ) बहुपिच्छो गुरुः स्निग्धः स्तिमितो मन्दवेदनः पाण्डुवर्णो-ऽल्पक्लेदश्चिरकारी व्रणः कफसम्भवः ( चचि. २५.१५ ) द्वादशप्रदुष्टा व्रणाः–श्वेतो-ऽवसन्नवर्त्मोऽतिस्थूलवर्त्मोऽतिपिञ्जरो नीलः श्यावोऽतिपिडको रक्तः कृष्णोऽतिपूतिको रोप्यः कुम्भीमुखेश्चेति ( चचि. २५.२४-२५ ) व्रणोपद्रवाः –विसर्पः पक्षघातः सिरास्तम्भोऽपतानको मोहोन्मादव्रणरुजो ज्वरस्तृष्णा हनुग्रहः कासश्छर्दि-रतीसारे । हिक्का श्वासो वेपथुश्चेति ( चचि. २५.२९-३१ ) षट्त्रिंशद् व्रणोपक्रमाः– 'शोफघ्नं षड्विधं शस्त्रकर्म अवपीडनं निर्वापणं सन्धानं स्वेदनं शमनमेषणमिति, शोधनौ रोपणौ कषायौ सप्रलेपनौ, तद्गुणे द्वे तैले, छादने पत्रं, बन्धने पत्रं, भोज्यमुत्सादनं सावसादनो दाहो द्विविधः, काठिन्यमार्दवकरे शुभे धूपनालेपने व्रणावचूर्णनं वर्ण्यरोपणं लोमरोहणं चेति ( चचि. २५. ४०-४३ ) सर्पिस्तैलवसापूयरक्त-श्यावाम्लपूतिकाः व्रणगन्धाः प्रकीर्तिताः ( चचि., २५.२७ )

वण करतो तो व्रण किंवा व्रण भरून आला तरी वण ज्याचा नष्ट होत नाही तो व्रण. व्रण दोन प्रकारचे असतात. शरिरात बिघाड होऊन होणारे किंवा बाह्य आघाताने होणारे (आगंतु). वात, पित्त, कफ, रक्त आणि सान्निपातिक असे पाच प्रकार शरीरातील बिघाडामुळे होणारे, बाह्य आघाताने होणारे ( आगंतु ) व्रण पुरुष ( माणूस). पशु, पक्षि, सरपटणारे प्राणी यांच्या चावण्याने आघाताने किंवा पडणे, दाबणे, प्रहार करणे, अग्नीचा चटका लागणे, भाजणे, क्षाराचा चटका लागणे, विषाघाताने, तीक्ष्ण औषधामुळे, दगडाचे तुकडे- शिंगे- चाके- फरशी-भाला काठ्या वगैरेच्या आघाताने होतात.

आघाताने झालेल्या सर्व व्रणावर तात्काळ उत्पन्न झालेल्या उष्म्यासंबंधी उपचार करावेत. ते पित्ता-प्रमाणे शीत उपचार करावेत. विशेषतः व्रण-संधानाकरितां तूप–मधाचा उपयोग करावा. वर सांगितलेल्या दोन्ही प्रकारच्या व्रणांवर हे उपयुक्त ठरते. नंतर दोषानुसार निजव्रणचिकित्सा करावी. व्रणामध्ये दोषांची पीडा साधारणपणे पंधरा प्रकाराने होते. शुद्ध व्रण होणे हा सोळावा प्रकार होय. त्या पीडांचे लक्षण २ प्रकारचे आहे. सामान्य व विशेष. पीडा होणे हे सामान्य लक्षण. व्रण म्हणजे गात्राचा चुरा होणे, वातादिदोषांची चिन्हे हे विशेष लक्षण. **वातामुळे** काळसर, तांबूस, पातळ, थंड, बुळबुळीत, अल्पस्रावी, रूक्ष, तडतडणारा, स्फुरण, ताणले जाणे, टोचणी, फूट लागणे इ० तीव्र वेदनायुक्त व मांसल भाग नसलेला व्रण असतो. **पित्तव्रण**–तात्काल होणारा पिवळट, निळसर, पळसाच्या सालीच्या काढ्याच्या रंगाचा, उष्ण, स्रावयुक्त, दाह, पू होणे, लाली हे विकार करणारा आणि पिवळ्या पुळयानी युक्त असतो. **कफज व्रण**– सतत भयंकर व पुष्कळ खाज असलेला, जाड कडा असलेला, ताठलेल्या शिरा-स्नायु यांच्या जाळ्याने युक्त, कठीण, पांढुरका मंद वेदनायुक्त, थंड-घट्ट-बुळबुळीत स्राव असणारा असा व्रण असून त्या ठिकाणी जडत्व वाटते.

**रक्तज व्रण**–पोवळ्याच्या रंगाचा, काळ्या फोडाच्या व पुळ्यांच्या जाळ्याने व्याप्त, घोड्याच्या तबेल्यात येतो तशा वासाचा, वेदनायुक्त, त्यातून धूर निघतोसे वाटणारा, रक्तस्रावी आणि पित्त व्रणाची लक्षणे असलेला असा असतो.

**वातपित्तात्मक व्रण**— टोचणी, दाह, धूर निघाल्यासारखे वाटणे, पिवळा-तांबूस रंग असलेला, त्याच रंगाचा स्राव होणारा असतो. **वातकफात्मक व्रण**— सारखी खाज–टोचणी असलेला, रूक्ष, जड, कठीण, वारंवार थंड व बुळबुळीत थोडा स्राव होणारा. **वातरक्तात्मक व्रण**— रूक्ष, पातळ, टोचणी अतिशय असलेला, त्या ठिकाणी बाधिर्य, लाल तांबूस रंगाचा व तसाच स्राव होणारा असतो. **पित्तकफात्मक व्रण**—तुपाच्या निवळीच्या रंगाचा

व्रण असून मासे धुतलेल्या पाण्यासारख्या वासाचा, मऊ, चरत जाणारा, उष्ण आणि काळसर स्राव होणारा असतो. **कफरक्तात्मक व्रण**— तांबडा, जड, स्निग्ध, बुळबुळीत, खाजयुक्त, स्थिर, रक्तयुक्त पांढरा स्राव होणारा असतो. **वातपित्तरक्तात्मक व्रण**— स्फुरण, टोचणी, दाह, धूर निघतोसे वाटणे, पिवळट-पातळ-तांबडा स्राव होणारा असतो. **वातकफरक्तात्मक व्रण**— खाज, स्फुरण, चिमचिम अशी खूप वेदना, पांढुरका-घट्ट-तांबूस स्राव होणारा असतो. **पित्तकफरक्तात्मक व्रण**- दाह, पू होणे, लाली, खाजयुक्त, पांढरा-घट्ट रक्त-स्राव होणारा असतो. **वातपित्तकफात्मक व्रण**- दाह, पू होणे, लाली, खाजयुक्त, पांढरट - घट्ट रक्तस्राव होणारा असतो. **वातपित्तकफात्मक व्रण**— तीनही दोषांच्या व्रणाचे रंग, वेदना व स्रावांनी युक्त असतो. **वातपित्तकफरक्तात्मक व्रण**— अतिदाह, अतिस्फुरण, घुसळल्यासारखी पीडा, टोचणी, कंडू, बाधिर्ययुक्त तसेच निरनिराळ्या रंगांनी, वेदनांनी व स्रावाने युक्त असतो. **शुद्ध व्रणाची लक्षणे**— जिभेच्या तळभागासारखा चांगल्या स्वरूपाचा आणि स्रावरहित असतो. **व्रणाचे रंग— वातामुळे** राखेसारखा किंवा पारव्याच्या रंगाचा खरखरीत व तांबूस. **रक्तपित्तज व्रणाचा रंग**— निळसर, पिवळा, हिरवा, काळसर, काळा, तांबडा, पिंगट व फिकट काळा. **कफज व्रण**— पांढरा, स्निग्ध व पांढुरका. **संनिपातज**— सर्व रंगयुक्त असतो.

**दुष्ट व्रणाचे लक्षण**— अति संकुचित किंवा विस्तृत, अति कठिण, अति मृदु, वर उचलत आलेला, खोलगट, अति शीत, अति उष्ण, कृष्ण रक्त पित्त शुक्ल इत्यादी रंगांपैकी कोणता तरी रंग, वाईट दिसणारा, दुर्गंध युक्त पू, मांस-सिरा-स्नायु यांनी परिपूर्ण, दुर्गंधयुक्त स्रावा-बरोबरच आतच जाणारा, वर उचलून आलेला, दिसायला आकार- रंग वगैरेनी सुद्धा मनाला किळस येईल असा दिसणारा व घाण-वास येणारा, वेदना असणारा, दाह-पाक-लाली-कंडू-सूज पुळ्या यांनी पीडित, अति दुष्ट रक्ताचा स्राव असणारा, दीर्घ काल असणारा असा व्रण दुष्ट समजावा.

**व्रणाची अरिष्ट चिन्हे**— मरण आणणाऱ्या व्रणाचा गंध— मद्य, अगरु, तूप, सुमन, पद्मकाष्ठ, चंदन, चंपक, यांच्या वासासारखा असतो. किंवा कुत्रा-घोडा-उंदीर-कावळा कुजलेल्या मांसाचे प्रमाणे वास असणारा, ढेकणाच्या किंवा चिखलाच्या वासासारखा वास असलेला मारक समजावा. निर-निराळ्या दोषांचे स्वरूप असून सुद्धा त्या दोषानुरूप दुःखदायक वेदना नसणे अनुचित. आणखीच काही तरी असणे उदा० पित्तांच्या स्वभावाप्रमाणे आकार-रंग आहे पण दाह आणि व्रणाची पाकावस्था नाही अशा व्रणाची ती मारक अवस्था समजावी. कफाचा असून त्यात दाह वगैरे असणे हे वाईट होय. वातज व्रण काळसर, पातळ स्रावाचा-मर्म, पीडाकर स्वभावी असून ही तो तशी पीडा करीत नाही, तोही मरण सूचक समजावा. तसेच जे व्रण फुरफुरतात, जळजळतात, घुरघुरतात, व त्वचा मांसावर असूनही शब्दयुक्त वायु ज्यांच्यातून निघतो, मर्मस्थानी नसूनही अति पीडा देतात तेही वाईट होत. जे व्रण आतून जळजळतात पण बाहेरून थंड असतात किंवा बाहेरून दाहयुक्त व आत थंड असतात तेही वर्ज्यच होत. ज्या व्रणावर ध्वज पताका दंड यांसारखी चिन्हे किंवा ज्यांचा आकार राजवाड्यासारखा दिसतो, ज्यांच्यावर चूर्ण पसरलेसे दिसते तेही वर्ज्य होत. मर्मस्थ जे व्रण अति पू, रक्त युक्त असतात तसेच जे बल, मांस, क्षय, श्वास, खोकला, अरुची यांनी पीडा करतात तेही वर्ज्य होत.

जे व्रण योग्य चिकित्सा करूनही बरे होत नाहीत तेही वर्ज्य करावे. **शुध्द व्रण लक्षणे**—तीनपैकी कोणताही दोष नाही, कडा काळसर, पृष्ठ भाग सम आहे, ज्याच्यावर पुळ्या दिसतात, वेदना व स्राव नाही तो.

**व्रण भरत असल्याची लक्षणे**—ज्यांच्या कडा ओलसर नाहीत, पारव्याच्या रंगाप्रमाणे ज्यांचा रंग आहे व स्थिर आहेत, पुळ्यांनी युक्त आहेत तो व्रण भरून येत आहे असे समजावे. **पूर्ण तऱ्हेने व्रण रोपण झाल्याची लक्षणे**—जो त्वचेच्या समान पातळीत येऊन ज्याची त्वचा मूळ रंगाची झाली आहे, व्रणाची जागा भरून आली असून तेथे गाठ, सूज

किंवा दुःख नाही तो व्रण भरून आला असे समजावे.

**व्रणाची साठ प्रकारांची चिकित्सा**—(१) लंघन (२) लेप (३) औषधे शिंपणे (४) अभ्यंग (५) स्वेद (६) हलुहलु मर्दन (७) पोटीस (८) पिकवणे (९) रक्तस्राव (१०) स्नेहपान (११) वांती करवणे (१२) ढाळक देणे (१३) तोडणे (१४) फोडणे (१५) फाडणे (१६) खरडणे (१७) शोधणे (१८) ओढणे (१९) भोक पाडणे (२०) पू व व्रणातील स्राव काढणे (२१) शिवणे (२२) व्रणाचे दोन्ही ओठ जुळवणे (२३) दाबणे (२४) रक्तस्राव थांबवणे (२५) शीतल द्रव्यांनी दाह शांत करणे (२६) शेकण्यासाठी गरम पोळी भाकरी बांधणे (२७) काढा (२८) वात (२९) चटणी (३०) तूप (३१) तेल (३२) आटवलेला काकवीसारखा काढा (३३) पूड भुरभुरणे (३४) धुरी देणे (३५) खोल व्रण वर आणणे (३६) त्वचेच्या वर आलेला व्रण बसवणे (३७) मऊ करणे (३८) व्रणाचा काळा डाग पांढरा करणे (३९) घर्षण (४०) व्रणाच्या त्वचेवर केस उत्पन्न करणे (४१) व्रणावरचे केस नाहीसे करणे (४२) बस्ती (४३) उत्तरबस्ती (४४) पट्टा बांधणे (४५) औषधी पान ठेवणे (४६) जंतूनाश (४७) पौष्टिक उपचार (४८) विषघ्न उपचार (४९) शिरोविरेचन (५०) नस्य (५१) तोंडात गुळणी धरणे (५२) धूम्रपान (५३) मधु (५४) सर्पि (५५) यन्त्र (५६) आहार (५७) जंतुनाशक उपचार ( धुरी देणे इ० ) (५८) क्षार (५९) अग्निकर्म (६०) पथ्य.

**कष्टसाध्य व्रण**— विषामुळे झालेले, कुष्टाने झालेले, राजयक्ष्म्यामुळे झालेले, मधुमेहामुळे झालेले, व्रण कष्टसाध्य आहेत.

**व्रणाचे** (२०) **प्रकार**— कृत्य, अकृत्य, दुष्ट, अदुष्ट, मर्मस्थित, अमर्मस्थित, संवृत, असंवृत, दारुण, अदारुण, स्रावी, अस्रावी, सविष, निर्विष, विषमस्थित, समस्थित, उत्संगी, अनुत्संगी, उत्सन्न आणि अवसन्न.

**शुद्ध व्रण लक्षण**— अतिलाल, पांढरा, किंवा काळा नसलेला, अल्प वेदनायुक्त, फार उंच किंवा खोलगट नसून भरून येत आहे, असा.

**अशुद्ध व्रण लक्षण**-- अति दुर्गंध, वर्ण बदललेला, पुष्कळ स्राव आणि अति वेदना युक्त असा.

**व्रणाचे उपद्रव**— विसर्प, अर्धांग वात, सिरास्तंभ, अपतानक, मोह, उन्माद, व्रणपीडा, ज्वर, तहान, हनुग्रह, खोकला, वांती, अतीसार, उचकी, श्वास, कंप.

**—केतु**–स्त्री., **वनस्पति० दुग्धफेनी** ( रा. ५.३४ ) दुग्धफेनी.

**—कोविद्**–वि., **व्रणविद्वान्, व्रणज्ञः** ( सुसू. १८.३५ ) व्रणनिदानचिकित्सा इ० सर्व जाणणारा, व्रणज्ञाता.

**—गन्धज्ञ**–पु., **यो व्रणस्य गन्धं जानाति सः** ( चचि. २५.२७ ) व्रणाचा गंध जाणणारा.

**—ग्रन्थि**–स्त्री., **व्रणयुक्तो ग्रन्थिः** ( सुसू. २३.८ ) व्रणयुक्त ग्रंथि.

**—घ्नी**–स्त्री., **कन्दगुडूची, कुमारी** ( र. ११.३७,३९ ) कोरफड.

**—चिन्तक**–पु., **व्रणचिकित्सकः, शस्त्रकर्मज्ञः** ( चचि. २५.३१ ) व्रणाबद्दलचे सर्व शास्त्र जाणणारा.

**—दोष**–पु., **पूयः** ( सुसू. २७.५ ) व्रणातील दोष–पू.

**—धूपन**–पु., **व्रणस्य धूपेनाऽनुयोजनम् षष्ठ्युपक्रमाणामेकतमः** ( सुचि. १.८ ) व्रणाला धूप देणे. व्रणाच्या साठ उपचारांपैकी एक उपचार.

**—धूम**–पु., **व्रणार्थं धूपः; शरावसंपुटोपनीतेन नेत्रेण व्रणधूपं व्रणमानयेत्। तस्य गुणाः–धूपनात् वेदनोपशमो व्रणवैशद्यमास्रावोपशमश्चेति** ( सुचि. ४०.१९ ) व्रणाला धुरी देणे, धूप देणे, शरावसंपुटाला नळी जोडून धूप देणे. **गुण**—वेदना शांत होतात, व्रण स्वच्छ होतो, व स्राव थांबतो.

**—नेत्र**–न., **व्रणयन्त्रम्, तदष्टाङ्गुलं प्रकीर्तितम्** ( सुचि. ३५.११ ) बस्ती देताना गुदात घालावयाची नळी म्हणजे नेत्र. व्रण म्हणजे भोक. भोक असलेली नळी. हिची लांबी आठ अंगुळे असते.

**—प्रच्छादन**–न., **व्रणच्छादनम्** ( चचि. २५.९५ ) व्रण झाकणे. व्रणावरचे आच्छादन.

**—प्रश्नाध्याय**–पु., **अध्यायसंज्ञा०** ( सुसू. २१.१ ) या नावाचा अध्याय.

**—यन्त्र**–न., **नाडीयन्त्र० तच्च व्रणच्छिद्रायामपरिणाहम्** ( सुसू. ७.१३ )

एक नाडीयंत्र, नळीच्या आकाराचे पोकळ यंत्र. हे व्रणाच्या छिद्राच्या लांबी व घेराच्या बेताचे असावे.

**–रोपणकषाय**–पु., **व्रणस्य रोपणं यः करोति सः कषायः; यथा न्यग्रोधोदुम्बराश्वत्थकदम्बप्लक्षवेतसकरवीरार्ककुटजसिद्धाः कषाया व्रणरोपणाः** (चचि.२५.८७) व्रण भरून आणणारा काढा. वड, उंबर, पिंपळ, कदंब, पिंपरी, वेत, कण्हेर, रुई, कुडा इत्यादींचा काढा व्रणरोपण आहे.

**–रोपणतैल**–न., **व्रणरोपणार्थं तैलम्, चन्दनं पद्मकं रोध्रमुत्पलं प्रियङ्गुर्हरिद्रा मधुकं पयः इत्येतदष्टद्रव्यसिद्धं तैलं व्रणरोपणं ज्ञेयम्** (सुचि.२८.३८-३९) व्रण भरून आणणारे तेल. हे तेल चंदन,पद्मकाष्ठ, रोध्र, निळे कमळ, गहुला, हळद, जेष्टमध आणि दूध ह्या द्रव्यांनी सिद्ध केले जाते. हे व्रण भरून आणते.

**–वर्ण**–पु., **व्रणस्य वर्णः; तद्यथा भस्मकपोतास्थिवर्णः पुरुषोऽरुणः कृष्ण इति मारुतजस्य; नीलः पीतो हरितः श्यावः कृष्णो रक्तः कपिलः पिङ्गल इति रक्तपित्तसमुत्थयोः; श्वेतः स्निग्धः पाण्डुरिति श्लेष्मजस्य; सर्ववर्णोपेतः सान्निपातिक इति वर्णज्ञानं विधातव्यम्** ( सुसू. २२.१२ )
व्रणाचा वर्ण. राखेसारखा, पारव्याच्या हाडासारखा, खरखरीत, अरुण, कृष्णवर्णी असे वायूचे रंग आहेत. निळा, पिंवळा, हिरवा, श्याव, कृष्ण, लाल, कपिल, पिंगट, असे रक्त आणि पित्ताचे आहेत. पांढरा, स्निग्ध, पांढुरका कफाचा रंग आहे. सर्व वर्णांनी युक्त सान्निपातिक वर्ण व्रणाचे आहेत.

**–वर्त्मन्**–न., **व्रणमुखम्** ( सुसू. १८.२१ ) **व्रणगताश्चत्वारः पार्श्वाः वाच्याः** ( ड. सुचि. १.३९ )
व्रणाचे तोंड, व्रणाचा मार्ग. ( चारही बाजू )

**–वस्तु**–न., **व्रणाधिष्ठानम्; अष्टौ व्रणवस्तूनि त्वङ्मांसं सिरा स्नायु अस्थि सन्धिः कोष्ठो मर्म चेति** ( सुसू. २२.३ ) **व्रणचिह्नम्** ( ड. सुसू. २१.४० )
शरिराच्या ज्या भागावर व्रण होतो तो भाग. त्वचा, मांस, शिरा, स्नायू, संधी, अस्थी, कोठा, मर्म हे आठ शरिराचे भाग व्रणवस्तु होत.

**–शुद्धि**–स्त्री., **व्रणस्य दोषदुष्टिनिवृत्तिः** ( सुसू. १८.६ )
व्रणातील दोष काढणे, व्रण निर्दोष करणे.

**–शोधन**–वि., **व्रणशुद्धिकरः** ( चचि. २५.८५ )
व्रणाची शुद्धी करणारे.



**–शोफ**–पु., **व्रणस्य पूर्वरूपम्** ( चचि. २५.४४ )
व्रणाचे पूर्वरूप जी सूज ती.

**–शोष**–पु., **रोग० शोषभेदः रक्तक्षयाद्वेदनाभिस्तथाऽहारयन्त्रणात् व्रणशोषः भवति । अयमसाध्यतमः** ( सुउ. ४१.२३ )
व्रणानंतर त्यामुळे होणारा शोष, क्षय. हा रक्तक्षयामुळे, दोर्घकाल वेदनांनी, आहार कमी केल्याने होतो. असाध्य.

**–शोषिन्**–वि., **व्रणनिमित्तं क्षीणः** ( सुचि. १.३० )
व्रणामुळे झालेला शोषी-क्षयी.

**–संनिवेश**–पु., **व्रणाऽवस्थानम्** (सुसू. २२.३ )
व्रणाचे अस्तित्व.

**–संरोह**–पु., **लक्षण० व्रणरोपणम्** ( असंउ. २९ )
व्रण रुझणे, व्रण भरून येणे.

**–संस्थान**–न., **व्रणाऽऽकृतिः** ( असंसू. ३७.१३ )
व्रणाची आकृति-आकार.

**–स्थान**–न., **व्रणवस्तु** ( चचि. २५.२६ )
व्रणाचे त्वचा मांस इत्यादी स्थान.

**–स्राव**–पु., **व्रणस्य स्रावः; चतुर्दश व्रणस्रावाः, लसीकाजलपूयाऽसृग्धारिदारुणपिञ्जराः, कषायनीलहरितस्निग्धरूक्षसिताऽसिता इति रूपैः समुद्दिष्टाः** ( चचि. २५.२८-२९ )
व्रणातून निघणारा स्राव. १४ प्रकारचा-लसीका, जल, पू, रक्त, धारायुक्त, भयंकर, फिकट, लाल, भगवा रंग, निळा रंग, हिरवट रंग, स्निग्ध, रूक्ष, काळा व पांढरा.

**–हारक**–पु., **वनस्पति० भूमिकदम्बः** ( रा. ९.१७४ )
गोरखमुंडी.

**–हृत्**–पु., **वनस्पति० कलिकारी** ( रा. ४.१८ )
कळलावी,

**व्रणाकृतिसमास**–पु., **दोषजव्रणाऽऽकृतीनां संक्षेपः, ताश्चत्वार आयताश्चतुरस्रा वृत्तास्त्रिपुटकाः इति** ( सुसू. २२.५ )
व्रणाकृतींचा थोडक्यात निर्देश. व्रण दीर्घ, चौकोनी, त्रिकोणी आणि वर्तुळ अशा आकारांचा संभवतो.

**व्रणान्त**–पु., **व्रणैकदेशः** ( सुचि. ३.५३ )
व्रणाचा एक भाग, व्रणाची कडा.
**वनस्पति० बोलम्** ( रा. ६.११७ ) बोळ.

**व्रणायतन**–न., **आयतनं नाम स्थानम्, अङ्गप्रत्यङ्गादिकं व्रणस्थानम्** ( सुसू. १८.२२ ) पहा ‘ व्रणवस्तु ’.

**व्रणायाम**–पु., रोग० वातव्याधिविशेषः ( असंनि. १५.२९ )

व्रणामुळे उत्पन्न झालेला धनुर्वात.

**व्रणारि**–पु., वनस्पति० अगस्त्यः ( रा. १०.१३ ) हदगा.

**व्रणितोपासनीय**–वि., अध्यायसंज्ञा० ( सुसू. १९.१ ) अध्यायाचे नाव. यात व्रणाचे उपचार सांगितले आहेत.

**व्रण्य**–वि., व्रणेभ्यः हितः, यथा पटोलादिगणः ( सुसू. ३८.३४ ) व्रणाला हितकर.

**व्रत**–न., शास्त्रोदितविधिना भोजनादि नियमादि ( ड. सुउ. ६०.२१ )

शास्त्रोक्त विधीने भोजन व आचरणाचे नियम पाळणे.

**व्रीहि**–पु., धान्य० तद्गुणाः–मधुरोऽम्लपाकः पित्तकरो गुरुर्बहुमूत्रपुरीषोष्मा च ( चसू. २७.१५ ) तद्-भेदाः–यथा कृष्णव्रीहिशालामुखजतुमुखनन्दीमुख-लावाक्षकत्वरितकुक्कुटाण्डकपारावतकपाटलाप्रभृतयो व्रीहयः ( सुसू. ४६.१२ ) सुश्रुते तद्‌गुणाः–वीर्यतो अहिमः कषायः अल्पाभिष्यन्दी बद्धवर्चाः षष्टिकगुणतुल्यश्च ( सुसू. ४६.१३ )

तांदळाचा एक वर्ग. तांदळाची जात. **गुण**—गोड, अम्लपाकी, पित्तकर, गुरु, मूत्र आणि पुरीष अधिक उत्पन्न करणारे. त्याचे प्रकार काळीसाळ, शाली-मुख, जतुमुख, नंदीमुख, वालाक्षक, त्वरित, कुकुटांडक, पारावतक, पाटल इ०. सुश्रुताने ह्याचे गुण किंचित शीत, तुरट, किंचित आर्द्रता करणारे, मलबद्धता करणारे व साठे साळीच्या गुणाप्रमाणेच वर्णन केले आहेत.

मान० यवः ( ड. सुशा. ४.४ )
मापन. जव. जवाइतके.

**–धान्यक**–पु., वनस्पति० व्रीहिः ( रा. १६.१०० ) तांदळाचा एक प्रकार.

**–पर्णिका**–स्त्री., वनस्पति० शालिपर्णी (रा. ४.११४) सालवण.

**–प्रमाण**–न., मान० यवः ( असंशा. ७.३४ ) जव. जवाइतके.

**–मात्र**–वि., यवमात्रम् ( सुशा. ८.९ ) जवाइतके.

**–मुख**–न., शस्त्र० व्यधनोपयोगि शस्त्रम् षडङ्गुलायतं द्व्यङ्गुलं वृन्तं चतुरङ्गुलं फलं व्रीहिविस्तारं तनुसंगू–( मू ) ढकण्टकं च मुखम् ( सुसू. ८.४; ड. ) अमांसलेषु स्थानेषु सिराव्यधनार्थमुपयुज्यते ( सुशा. ८.९ )

व्रणाला भोक पाडण्याचे शस्त्र. तांदळासारखे टोक असलेले शस्त्र. सहा अंगुळे लांब, दोन अंगुळे मूठ असलेले, चार अंगुळांचे पाते असलेले, टोकावर आवरण असलेले शस्त्र. मांसरहित ठिकाणी असलेल्या शिरेचा वेध करण्यासाठी उपयोगी.

**–वक्त्र**–न., व्रीहिमुखम् ( अहसू. २६.११ ) तांदळासारखे टोक असलेले.

**–श्रेष्ठा**–स्त्री., वनस्पति० व्रीहिः ( रा. १६.७८ ) एक तांदळाचा प्रकार.

**व्रीहिक**–पु., वनस्पति० व्रीहिः ( रा. १६.१०० ) तांदळाचा एक वर्ग.

# आयुर्वेदीय - शब्दकोशः

## श



**शक**–पु., **तन्नामकः लोकः** ( चचि. ३०.३१६ )
लोकविशेष. शक नावाचे लोक.

**शकट**–पु., **वनस्पति० तिनिशः** ( रापरि. ९.२४ )
तिवस.

**शकटाक्ष**–पु., **वनस्पति० धवः** ( ध. परि ५.४ )
धावडा.

**शकल**–न., **वनस्पति० त्वक्** ( ध. २.५० ) दालचिनी.

( **शकली** )–स्त्री., **लघ्वामलकफलम्** ( र. ३०.५८-५९ )
कोवळा आवळा, बारीक आवळा.

**शकलिन्**–पु., **मत्स्य०** ( चसू. २६.८३ ) **नयनाऽऽमये तस्य स्पर्श उपयुक्तः** ( काखिल. १३.७५ )
शकलिन् नावाचा मासा, डोळ्यांच्या विकारात याचा स्पर्श उपयुक्त आहे.
**निर्विषसर्प०** ( असंउ. ४१ )
विष नसलेल्या सापाचे नांव.

**शकुन**–पु., **पक्षि० वामो दक्षिणो वा शुभसूचकोऽयम्** ( सुसू. २९.३३ )
शकुनपक्षी. हा उजवा किंवा डावा गेला तरी शुभ.
पु., न., **शुभाशुभविज्ञानसाधनम्** (सुसू. २९.३ )
**पक्षिविशेषप्रशस्तवाक्यादि** ( ड. सुसू. १०.४ )
शुभ आणि अशुभ जाणण्याचे साधन. काही विशिष्ट पक्षी तसेच प्रशस्त वाक्ये शुभ असतात, काही अशुभ असतात.

( **शकुनी** )–स्त्री., **बालग्रह० नवग्रहेष्वेकः** (सुउ. २७.१०)
**क्षीरदुष्टिहेतुकारको ग्रहः** ( कासू. १९ )
शकुनिग्रह, नवग्रहांपैकी एक. दूध दुष्ट करणारा ग्रह.

**शकुनाहृत**–पु., **धान्य० शालिभेदः द्र० ' शालि '** ( चसू. २७.८; सुसू. २०.५ )
शकुन नावाचा तांदळाचा भेद.

**शकुनि**–स्त्री., **स्त्रीशरीरग्रह०** ( असंउ. ३ ) **रेवतीग्रहगृहीतरूपम्** ( का रेवतीकल्प. ७ ) **तल्लक्षणानि-स्रस्ताङ्गत्वमतिसारो जिह्वातालुगले व्रणाश्च भवन्ति । दाहादियुक्ताः स्फोटाः सन्धिषु पुनः पुनर्निशि स्युस्ते चाह्नि प्रविलीयन्ते। मुखपाको गुदपाको भयं, शकुनिगन्धत्वं, ज्वरः** ( असंउ. ३ )
पीडा देणाऱ्याच्या स्त्रीदेहधारी ग्रहाचे नाव. त्या ग्रहामुळे पीडित शरिरावर होणारी चिन्हे–सर्व शरीर त्रस्त होते. अतीसार, जिव्हा–तालु–गळा या ठिकाणी व्रण होतात. दाहयुक्त स्फोट रात्री सांध्यामध्ये उत्पन्न होतात. दिवसा नाहीसे होतात. मुखपाक, गुदपाक, भय वाटणे, शकुनि पक्ष्यासारखा वास. ज्वराचाही त्रास होतो.

**शकुनी**–स्त्री., ( सुउ. २७.१० )
शकुनिग्रह.
**–प्रतिषेध**–पु., **अध्याय०** ( सुउ. ३०.१ )
अध्यायाचे नाव. यात ग्रहाच्या निवारणासंबंधी उपचार आहेत.

**शकुन्द**–पु., **वनस्पति० करवीरः** (रा. १०. १) कण्हेर.

**शकुलाक्षिका**–स्त्री., **वनस्पति० गण्डदूर्वा, द्र० ' दूर्वा '** ( ध.४.१४५ )दूर्वांचा प्रकार, गाठी असलेल्या दूर्वा.

**शकुलाक्षी**–स्त्री., **वनस्पति० गण्डदूर्वा, द्र० ' दूर्वा '** ( रा. ८.२३५ )
गाठीदूर्वा, दूर्वांचा प्रकार, पहा 'शकुलाक्षिका'.

**शकुलादनी**–स्त्री.,**वनस्पति० कटुका**(चसू.४.९;ध.१.३८)
कुटकी, जलपिप्पली, जटामांसी.
**महाराष्ट्री** ( रापरि. ४.१२ ) मराठी.
**जलपिप्पली** ( ध. ४.६४ ) जलपिंपळी.
**शाक० तद्गुणाः–तिक्ता, कटुविपाका, शीता, कफपित्तहरा च** ( चसू. २७.९६ )
कुटकी ( शाकविशेष ), कडु, पचल्यानंतर तिखट, थंड, कफ पित्त हारक.

**शकुलीमत्स्य**–पु., **मत्स्य०** ( सुक.३.५ )
मासा, मत्स्यविशेष.

**शकृत्**–न., **मलः, पुरीषम्** ( सुचि. ७.२१ ) विष्ठा, मळ.
**अधोनिर्दिष्टप्राणिजपुरीषाणि औषधार्थमुपयुज्यन्ते–गोमहिषीगजाश्वाजाविखरोष्ट्राः, विष्किरमृग-महामृगजलचारिप्रसहाः** ( असंसू. ६.१४५-४७ ) **दक्षादिपक्षिणः** ( अहसू. ३०.१७ ) **छागः** ( सुउ. ४४.२२ )
खाली लिहिलेल्या प्राण्याचे शेण औषधासाठी उपयोगात आणतात–गाय, म्हैस, हत्ती, घोडा, शेळी,

मेंढी, गाढव, ऊंट वरील वर्गांतील प्राणी व कोंबडा इत्यादी पक्षी.

**( शकृद् )–ग्रह**–पु., लक्षण० **विङ्ग्रहः, पुरीषग्रहः** ( अहसू. १८.१० )
मलावरोध, मलग्रह.

**–दर्शन**–न., **पुरीषदर्शनम्** ( अहसू. २८.९ )
मलदर्शन.

**–भेद**–पु., लक्षण० **विड्भेदो द्रवपुरीषत्वम्** ( चइ. १० .२०; सुउ. ५४.११ )
मळ पातळ होणे. मळ फुटीर होणे.

**–रस**–पु., **पुरीषोत्थरसः** ( चचि. १७.११६; सुउ. ३९.२४० ) **गोगजाऽश्वाऽव्यजानां शकृद्रसा यक्ष्मनिवारकाः** ( सुउ. ४१.४४ )
शेणाचा ( मलाचा ) रस, गाय, हत्ती, घोडे, मेंढी, शेळी, यांच्या शेणाचा रस राजयक्ष्मानिवारक आहे.

**–रसघृत**–न., सिद्धघृत० **यक्ष्मनिवारणम्** ( सुउ. ४१.४४-४६ )
गाय, घोडा इ०च्या शेणाच्या रसाने सिद्ध केलेले घृत. हे क्षयनिवारक आहे.

**–वमन**–न., लक्षण० **पुरीषच्छर्दिः** ( सुउ. ५६.२४ )
विष्ठायुक्त ओकारी.

**–वाहिन्**–वि., **पुरीषवहम्** (स्रोतः) (असंशा. ६.४३)
द्र० ' स्रोतस् ' पुरीषवह ( स्रोतस ).

**–विष**–न., **पुरीषविषम्, चिपिटपिच्चिटककषाय-वासिकसर्षपकतोटकवर्चःकीटकौण्डिन्यकाः शकृद्विषा भवन्ति** ( सुक. ३.५ ) द्र० ' विष '
मलविष. ज्यांचे पुरीषच विषारी असते असे प्राणी– चिपिट, पिच्चिटक, कषायवासिक, सर्षपक, तोटक, कीट कौंडिन्यक.

**( शकृन् )–मार्ग**–पु., शारीर० **गुदम्** (ड. सुउ. ५८.७)
गुद, मलमार्ग.

**शक्ति**–स्त्री., **उत्साहशक्तिः, सामर्थ्यम्** ( सुसू. २.३ )
सामर्थ्य, बल, उत्साह, शक्ति.
आयुध० ( सुसू. २८.१८-१९ ) हत्यार.

**–विनिश्चय**–पु., **आतुरशक्तेर्विनिश्चयः** ( सुसू. ४३.१० )
रोग्याच्या शक्तीचा अंदाज करणे.

**शक्तु**–पु., **भृष्टानां निस्तुषयवानां चूर्णम्, सक्तवः,** (हे.) **तद्गुणाः–बृंहणा वृष्यास्तृष्णापित्तकफापहाः सद्यो-बलकरा भेदिनः पवनापहाश्च** ( सुसू. ४६.४११ ) **शोफपाचकं द्रव्यम्** ( सुसू. ३७.९ ) **सक्तूनां लेह आशु जीर्यंते** ( सुसू. ४६.४११-१२ )
सातू भाजून टरफले काढून त्याचे केलेले चूर्ण. त्या चूर्णाचे गुण— शक्तिवर्धक, शुक्रवर्धक, तहान–पित्त –कफ नाशक. ताबडतोब बल देणारे, भेदन करणारे, वातनाशक आहे. सुजेला पचविणारे आहे. अशा-सातूचा लेह लवकर पचतो.

**शक्त्युत्कर्ष**–पु., **सामर्थ्योत्कर्षः** ( अहसू . ९.१५ )
सामर्थ्याची वाढ.

**शक्य**–वि., **साध्यः** ( चचि. १७.१४९ ) साध्य.

**शक्र**–पु., **इन्द्रः** ( चसू. १.५ ) इंद्र.
वनस्पति० **कुटजः** ( चक. ५.४; रा. ९.१८ ) कुडा.

**–गोप**–पु., कीट० **इन्द्रवधूः, इन्द्रगोपकः** ( सुसू. ६.३२ )
इंद्रगोप किडा. मृगनक्षत्राच्या वृष्टीनंतर दिसणारा लाल किडा.

**–नील**–न., रत्न० **इन्द्रनीलम्** ( र. ४.५१-५३ )
शनीचा खडा, नीळ, रत्नविशेष.

**–पादप**–पु., वनस्पति० **कुटजः** ( रा. ९.१८ )
कुडा, देवदार.

**–बीज**–न., वनस्पति० **इन्द्रयवः** ( रा. ९.२१ )
इंद्रजव, कुड्याचे बी.

**–मातृ**–स्त्री., वनस्पति० **भार्ङ्गी** ( ध. १.६८ )
भारंगी.

**–यव**–पु., वनस्पति० **इन्द्रयवः** (ड.सुउ. ३९.२२७)
इंद्रजव.

**–वल्ली**–स्त्री., वनस्पति० **इन्द्रवारुणी** ( रा. ३.३७३ )
कडू वृंदावन.

**–सदन**–न.. **इन्द्रगृहम्** ( सुचि. २९.१७ )
इंद्रगृह, इंद्राचे घर.

**–सलोकता**–स्त्री., **मरणोत्तरम् इन्द्रसालोक्यम्, इन्द्रसमानलोकता** ( सुसू. १.४१ )
मरणानंतर इंद्राच्या लोकात जाणे.

**शक्राह्व**–पु., वनस्पति० **इन्द्रयवः** ( ध. २.१५ )
इंद्रजव.

**शक्ल**–वि., **प्रियवाक्** ( असंसू. २.४ )
गोडबोल्या, गोड बोलणारा.

**शङ्कर**–वि., **सुखकरम्, कल्याणकरम्** ( चचि. २६.९६; सुचि. २४.७६ )
सुखकर, कल्याणकर.

**( शङ्करी)**–वि.. **सुखकरी** ( इन्दु. असंउ. ४३ )
सुख देणारी.

स्त्री., **वनस्पति० शमी** ( ध. ५.९५ ) शमी.

**शङ्करादि**–पु., **वनस्पति० श्वेतार्कः द्र० 'अर्क'** ( रा. १०.२९ )
पांढरी रुई, मांदार.

**शङ्काविष**–न., **शङ्कया यस्य बाधा भवति तत्, अत्र निर्विषदंशेनाऽपि शङ्कया विषलक्षणानि भवन्ति। ज्वरच्छर्दिमूर्छादाहग्लानिमोहाऽतिसारा अपि वा भवेयुः** ( चचि. २३.२२१-२२ )
शंकाविष. निर्विष दंशाने सुद्धा विषयुक्त दंश आहे अशी शंका येताच विषाची लक्षणे होतात. त्यास शंकाविष म्हणतात. **लक्षणे**— ताप, वांती, मूर्च्छा, दाह, ग्लानी, मोह, अतिसार.

**शङ्कित**–पु., **वनस्पति० चोरकः** ( ध. ३.७१ )
चोरओवा.

**शङ्कु**–पु., **तीक्ष्णाऽग्रो लोहादिमयःशस्त्रविशेषः** (चनि.३.७) **यन्त्र० आकुञ्चिताऽऽकारो बडिशविशेषः** ( सुचि. १५.१२ )
लोखंडी तीक्ष्ण टोकदार–अणकुचीदार शस्त्र. आकुंचित आकाराचे हत्यार.

**–फला**–स्त्री., **वनस्पति० शमी** ( ध. ५.९५ ) शमी.

**–फलिका**–स्त्री., **वनस्पति० शमी** (रा.८.१५२) शमी.

**–मुखी**–स्त्री., **निर्विषजलूका० सा च यकृद्वर्णा, शीघ्रपायिनी, दीर्घतीक्ष्णमुखी च** ( सुसू. १३.१२ ) **द्र० ' जलौका '**
शंकुमुखी जळवा निर्विष असतात. यकृताप्रमाणे रंग असतो. लवकर रक्त पितात. त्यांचे तोंड लांबट व अणकुचीदार असते.

**–स्फोटन**–न., **लक्षण० कीलकाहननवत्तीव्रवेदना** ( सुउ. ४२.८१ )
खिळयाने भोसकल्याप्रमाणे होणारी वेदना.

**शङ्ख**–पु., **भैषज्य० जलस्थकीटशरीरघटकं द्रव्यम्** (चचि.३.२६१) **तद्गुणाः–स्वादुः,(कटुः)(रा) कटुविपाकी,उष्णः,(शीतः)(रा)चक्षुष्यः, पुष्टिवीर्यबलप्रदः, पित्तघ्नः, परिणामशूलरक्तपित्तगुल्मशूलश्वासविषनाशकः** ( ध. ३.१७९; रा. १३.२४५ ) **रक्तसंग्राहकः** ( चचि. १९.८२ ) **रक्तपित्ते दाहपिपासानाशकः** ( चचि. ४.७३ ) **विसर्पे प्रदेहार्थमुपयुज्यते** ( चचि. २१.८२ ) **पाण्डुरोगनाशकः** (सुउ.४४.२१)
पाण्यांतील एक प्रकारच्या किड्याचे शरीरघटक द्रव्य. शंख, समुद्रात सापडणारा पदार्थ. शंखाचे गुण— गोड, तिखट पचल्यावरही तिखट, उष्ण, काहींच्या मते शीत, डोळ्याला हितकारक, पौष्टिक, शुक्र–बलवर्धक, पित्तनाशक, परिणामशूल, रक्तपित्त, गुल्म, शूल, श्वास, विषनाशक आहे. रक्तसंग्राहक, दाह आणि तहाननाशक आहे. विसर्पामध्ये लेप घालण्यास उपयोगी, पांडुरोगनाशक आहे.
**नखम्** ( ध. ३.५८ )
नखी नावाचे धूप देण्याचे एक द्रव्य. याला शुक्ति, हनु, बदरीपत्रही म्हणतात.
**जलचरकीटक०** (चसू. २७.४०) **वारिशयपदार्थः** ( सुउ. १२.२९-३० )
पाण्यातील किडा.
**शारीर० कर्णसमीपस्थाऽस्थिविशेषः** ( चशा. ७.६; **भ्रूकर्णमध्यम्** ( इन्दु. असंउ. २७ )
"शंख"–कानाच्या जवळचा अस्थि. भुवई आणि कान यांच्या बरोबर मध्यावर याचे स्थान आहे.
**दशप्राणायतनेष्वेकम्** ( चसू. २९.३ ) **मर्म०** ( असंशा. ७.२३ ) **द्र० ' मर्मन् '**
शंख– मर्मविशेष. प्राणाच्या दहा स्थानांपैकी एक.

**–कपाल**–पु., **सर्प० दर्वीकरभेदः** (सुक.४.३४-(१))
सापाचा प्रकार.

**–केशान्तसन्धि**–पु., **शङ्खेन केशान्तेन च समं सन्धिः** ( चक्र. चचि. ९.७७ )
डोक्यावरील केस व शंख (कानशीळ) यांच्यामध्ये असणारा संधी.

**–चूर्ण**–न., **सुदग्धशङ्खचूर्णम्** ( ड. सुउ. ३१.६ )
चांगल्या भाजलेल्या शंखाचे चूर्ण.

**–द्राविन्**–पु., **वनस्पति० मधुजम्बीरः** ( ध. ५.१८ )
गोड लिंबु, मुसंबे.
**अम्लवेतसः** ( रा. ६.१४८ )अम्लवेतस.

**–नक**–पु., **भैषज्य० क्षुद्रशङ्खः, शङ्खनकः** ( ड. सुसू. ४६.१०८ )
लहान शंख, शंखाचा प्रकार.

**–नाभि**–पु., **भैषज्य० शङ्खस्य नाभिः** (अहृसू.३०.१६)
शंखनाभि. शंखाचे आवरणाचा भाग काढून टाकल्यावर आतील शिल्लक राहाणारा जड व कठिण भाग.
**वनस्पति० अस्य लेपो वेदनाशान्त्यर्थं श्वित्रे उपयुक्तः** ( असंचि. २२ )
शंख नाभी. विशिष्ट वनस्पती. हिचा लेप वेदनाशमन होण्याकरिता कोडावर उपयुक्त.

सुगन्धिद्रव्य० अर्जुनाह्वनेत्ररोगे माक्षिकेण युक्तेय-मञ्जनोपयोगिनी ( असंउ. १४ )
नखी. ( शंखी ) सुगंधीद्रव्य. अहिरा या रोगावर मधाबरोबर अंजनाला उपयोगी.
क्षारः ( ड. सुसू. ११.११ )
शंखक्षार.

**–नाभ्याकृति**–वि., अल्पमुखाऽन्तर्महासुषिरा ( योनिः ) ( सुशा. ५.४३ )
अल्पमुख असणारी व आतील भाग पुष्कळ पोकळ असणारी ( योनि ).

**–पुष्पिका**–स्त्री., वनस्पति० विष्णुक्रान्ता ( ध. ४.११५ )
विष्णुक्रान्ता.
शङ्खपुष्पी ( र. ११.५४-५७ ) शंखपुष्पी.
श्वेतपुष्पा ( रा ११.५२-५७ )
श्वेतपुष्पा शंखाहुली, विष्णुक्रान्ताभेद.

**–पुष्पी**–स्त्री., वनस्पति० ( चचि. १०.६२ )
तद्गुणाः–कटुस्तिक्ता; ( कषाया ) ( सु. ); ( उष्णा ) ( ध.सु. ); ( शीता ) ( रा. ); मेध्या, रसायनी, स्वर्या; सरा, वृष्या, स्मृतिकान्तिबलाग्निदा ( सु. ); पित्तकफघ्नी, कासविषाऽपस्मारभूतग्रहनाशिनी, मानसरोगहृच्च ( ध. ४.११३; रा. ३.१७२; सुउ. ५२.४२ )
हिं.—शङ्खिनी.
म.—शङ्खपुष्पी.
बं.—डङ्कुनी.
शंखपुष्पी. गुण–तिखट, कडु, तुरट, उष्ण, बुद्धिवर्धक, रसायन, आवाजाला हितकारक, सारक, पुष्टिकर, स्मरणशक्ति-कांति-बल-अग्निवर्धक आहे. कफपित्त-शामक. खोकला-विष-अपस्मार-भूतपिशाच्च व मानसरोग नाशक आहे.
हपुषा ( सुउ.५२.४२ ) शेरणी, खडशेरणी.
चिरिण्टी ( इन्दुः; असंउ. ४८ ) शंखपुष्पी.
वीरटिः ( इन्दुः, असंउ. १ ) शंखपुष्पी.

**–भेद**–पु., लक्षण० शङ्खस्य ललाटास्थिविशेषस्य भेदवत्स्फुटनम्; अशीतिवातविकारेष्वेकः ( चसू. २०.११; असंनि. ४ )
कपाळ–डोके दुखताना जणू काही कानशील फुटत आहे अशी पीडा होणे. ऐशी वातविकारांपैकी एक.

**–मर्मन्**–न., भ्रुवोः पुच्छान्तयोरुपरि कर्णललाटयो-र्मध्ये शङ्खौ नाम मर्मणी, तत्र विद्धे सद्योमरणम्, ( सुशा. ६.२७ ) द्र० 'मर्मन्'
शंखमर्म. भुवयीच्या शेवटच्या टोकाच्यावर कान व कपाळ यांच्या मध्ये दोन्ही बाजूस असलेले शंख नावाचे मर्म. त्या ठिकाणी आघात झाला असताना ताबडतोब मरण येते.

**–मालिनी**–स्त्री., वनस्पति० शङ्खपुष्पी ( रा. ३.१७१ ) शंखपुष्पी.

**–मूल**–न., वनस्पति० मूलकम् ( रा. ७.५१ ) मुळा.

**–यूथिका**–स्त्री., वनस्पति० श्वेतयूथिका द्र० 'यूथिका' ( ध. ५.१४९ ) पांढरी जुई.

**–शूल**–पु., लक्षण० ललाटाऽऽस्थिशूलम् ( चनि. ३.७ )
कानशिळाच्या हाडाच्या ठिकाणी शूळ.

**शङ्खक**–पु., शिरोरोग० पित्तप्रधानैः सरक्तैर्वाताद्यैर्दोषैः शङ्खे दारुणः शोफो भवति। अत्र शोफे तीव्र-दाहरुजारागप्रलापज्वरतृड्भ्रममूर्च्छा भवन्ति। आस्यं तिक्तं वदनं पीतं च भवति। अयं रोगः त्रिरात्राज्जीवितं हन्ति ( चसि. ९.७२; सुउ. २५.१६-१७; असंउ. २७ ) दुश्चिकित्स्योऽयं व्याधिः, नस्यार्थं, पानार्थं च क्षीरयुक्तं घृतं देयम्। शीतपरिषेकश्च कार्यः ( सुउ. २६.३८-३९ )
शंखक नावाचा शिरोरोग. डोक्यामध्ये पित्तप्रधान सरक्त वात इत्यादी दोषांनी भयंकर अशी सूज निर्माण होते. त्याबरोबरच तीव्र दाह, ठणका, लाली, प्रलाप, ज्वर, तहान, भ्रम, मूर्च्छा उत्पन्न होते. तोंड कडू होते, चेहरा पिवळा होतो. हा रोग तीन दिवसात माणसाला मारक ठरतो. नस्यासाठी व पिण्यासाठी तुपात दूध घालून उपयोग करावा. थंड द्रवाच्या सिंचनाचाही उपयोग करावा.

**शङ्खालुक**–न., कन्दशाक० ( सुसू. ४६.२९८ )
शंखाळु, भाजीचा कांदा.

**शङ्खावर्तसंधि**–पु., अस्थिसन्धिप्रकार० श्रोत्रशृङ्गाटकेषु शङ्खावर्ताः ( सुशा. ५.२७; असंशा. ५.७७ )
शंखावर्त संधी. अस्थिसंधीप्रकार. कान व शृंगाटक मर्मे यात हे संधी आहेत.

**शङ्खाह्वा**–स्त्री., वनस्पति० शङ्खपुष्पी ( ध. ४.११३ )
शंखपुष्पी.

**( शङ्खिका )**–स्त्री., वनस्पति० शङ्खपुष्पी
( र. २१.७१-७३ )
शंखपुष्पी.
**भैषज्य० क्षुद्रशङ्खः** ( र. ७.२२ )
अगदी लहान शंख.

**शङ्खिनी**–स्त्री., लता० **महाकषायवर्गे भेदनीयगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.९ ) **कटुतिक्ताऽम्ला, गुरुः, स्निग्धा, विशोधनी, दीपनी, रुच्या, त्रिदोषशमनी, कृमिविषकुष्ठशोथोदरनाशिनी, रक्तदोषघ्नी च** ( ध. १.२५६; रा. ३.३८० ) **स्नेहविरचने उपयुक्ता** ( सुचि. ३१.५ ) **व्रणशोधनी** ( सुसू. ३७.१२ ) **तत्सिद्धतैलं दुष्टव्रणशोधनम्** ( सुसू. ४५.१२४ )
हिं.—शङ्खिनी.
**म.—यवोची, टिटवी.**
गु.—शङ्खहेल्य आख्युफुटामाणा.
बं.—यवेची.
यवोची, टिटवी ही वेल महाकषायवर्गातील भेदनीयगणातील एक द्रव्य आहे. तिखट, कडु; आंबट, गुरु, स्निग्ध, शोधक, दीपक, रुचि उत्पादक त्रिदोष शामक आहे. कृमि-विष-कुष्ठ-सूज-उदर नाशक ,आहे. तसेच रक्तदोषनाशकरी आहे. स्नेह विरेचनास उपयोगी. व्रणशोधनी तिने सिद्ध तेल दुष्ट व्रणशोधन करणारे आहे.
**श्वेतबुध्ना** ( चक्र. चसू. १.८१-८५; ड. सुसू. ३८.२९-३० )
यवतिक्ताभेद, चोरपुष्पी.
**–फल**–पु., **वनस्पति० शिरीषः** ( ध. ५.११२ )
शिरीष, शिरस.

**शङ्खेश्वर**–पु., पारदयोग० **शंखवराटकनीलतुत्थपारदादिसाधितोऽयं राजयक्ष्महरः** ( र. १४.२०-२२ )
सिद्धौषधाचे नाव. शंख, कवडी, मोरचूद इत्यादी युक्त पाऱ्याचा योग. क्षयनाशक.

**शची**–स्त्री., **इन्द्रजाया** ( असंशा. १२.८ ) इंद्रपत्नी.
**–पति**–पु., **इन्द्रः** ( चसू. १.१८ ) इंद्र.

**शटिका**–स्त्री., **वनस्पति० सटी** ( रा. ६.८६ ) कचोरा.

**शटी**–स्त्री., **वनस्पति० सटी** ( चसू. २७.८८ ) कचोरा.
**आम्रहरिद्रा** ( चचि.१९.२७ ) आंबेहळद.
**–शाक**–न., **पत्रशाक० तद्गुणाः–शीतं, लघु, संग्राहि, दोषापहं च** ( सुसू. ४६.२७६ )
कचोरा पाने. गुण–थंड, हलके, मळ घट्ट करणारे, दोषनाशक.
**–सिद्धसर्पिस्**–न., **सिद्धघृत०** ( सुशा. २.८ )
कचोरासिद्ध तूप. आर्तवात गाठी होत असतील तर उपयुक्त.

**शट्यादिचूर्ण**–न., **सिद्धौषधि०**
( चचि. १७.१२३-१२४ )
कचोरा, चोरओवा, काकडशिंगी इत्यादींचे चूर्ण. श्वासावर उपयुक्त.

**शट्यादितैल**–न., **सिद्धतैल०** ( सुचि. ३७.८-१० )
कचोरा, पुष्करमूळ इ० द्रव्यसिद्ध तेल. मूढवात, मूळव्याध, ग्रहणीवर उपयुक्त.

**शट्यादिकवर्ग**–पु., **द्रव्यगण० शटी, पुष्करमूलं, दुरालभा, व्याघ्री, शृङ्गी, गुडूची, नागरं, पाठा, कटुरोहिणी, किरातम्, एष गणः संनिपातज्वरापहः**
( चचि. ३.२११-२१२ )
शट्यादी गणातील ओषधे. कचोरा, पुष्करमूळ धमासा, डोरली, गुळवेल, काकडशिंगी, सुंठ, पहाडमूळ, कुटकी, काडेकिराईत ही औषधे संनिपातज्वर नाशक आहेत.

**शठ**–वि., **क्रूरः** ( चक्र. चसू. ७.५६ ) क्रूर.
पु., **वनस्पति० धत्तूरः** ( ध. ४.७ ) धोतरा.
**तगरम्** ( ध. ३.५३ ) तगर.
न., **वनस्पति० कुङ्कुमम्** ( रा. १२.२१ )
केशर, नागकेशर.
**खनिज० तीक्ष्णलोहम्, द्र० 'लोह'** (रा. १३.३०)
तीक्ष्णलोह.

**( शठी )**–स्त्री., **वनस्पति०सठी** (ध.१.६१;अहृसू.६.७२)
कचोरा.

**शठाम्बा**–स्त्री., **वनस्पति० अम्बष्ठा** ( रा. ४.१७० )
पहाडमूळ, मोरशिखा.

**शण**–पु., **वनस्पति० क्षुपोऽयम्** (सुसू. ३७.९) **तद्गुणाः–अम्लः, कषायो मलगर्भास्रपातनो वान्तिकृद्वातकफनुत्तीव्राङ्गमर्दजित्** ( रापरि. ४.१०-११ ) **अस्य काष्ठं दन्तधावने निषिद्धम्** ( असंसू. ३.२१ )
हिं.—अम्बाडी.
**म.—अम्बाडी.**
गु.—अम्बाडी.
बं.—मेस्टापत.
ता.—ओलीभांजी.

सण, अंबाडी. आंबट, तुरट, मलभेदन करणारी. गर्भ आणि रक्तस्राव करणारी, वान्ती करणारी, कफ-वात नाशक, तीव्र अंगमर्दनाशक आहे. या काडीने दातवण करू नये.

**–घण्टिका**–स्त्री., वनस्पति० शणपुष्पी ( ध.१.२०० ) ताग.

**–जसूत्र**–न., **शणनिर्मिता रज्जुः व्रणौष्ठसीवनार्थमुपयुज्यते** ( सुसू. २५.२०-२१ )
तागाची दोरी, व्रणाच्या किंवा जखमेच्या कडा शिवण्यासाठी उपयोगी.

**–तूल**–पु., तूल० ( सुसू. २३.१२ ) **शणाख्यस्य द्रव्यस्य सूक्ष्मरोम** ( इन्दु. असंउ. २९ )
तागाचे बारीक धागे.

**–पुष्प**–न., शाक० ( चसू.२७.९९ ) **इदं बन्धनार्हत्वचः शणस्य पुष्पम् तद्गुणाः–मधुरं, मधुरविपाकं, रक्तपित्तहरम्** ( सुसू. ४६.२८१ )
तागाचे फूल. भाजीकरिता उपयोगी. त्याचे गुण— गोड, गोड विपाक व रक्तपित्त शामक आहे. व्रणबंधनासाठी ह्या झाडाची साल उपयुक्त.

**(–पुष्पी)**–स्त्री., वनस्पति० **वमनोपगगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.२३; सुसू. ३९.३ ) **तद्गुणाः–तिक्ता, कषाया, वमनकरी, त्रिदोषघ्नी, कण्ठमुखहृद्रोगज्वराऽजीर्णरक्तदोषघ्नी च** ( ध. १.२००; रा. ४.२९८-९९ )
हिं.—जन्जानिया.
**म.—तागी.**
बं.—जन्जानिया.
ता.—वेट्टाकिलू.
सं.—घंटालक.
तागाचा नुसती फुले येणारा परंतु फळे व बिया न येणारा एक प्रकार. (स्त्री) वमनासाठी उपयोगी. कडु, तुरट, त्रिदोषशामक, कंठ–मुख–हृद्रोग–ज्वर–अजीर्ण रक्तदोषनाशक आहे.

**शणक**–पु., **चुच्च्वादिवर्गे शाक०** ( सुसू. ४६.२४९ )
शणक, एक भाजी.

**( शणिका )**–स्त्री., वनस्पति० शणपुष्पी ( रा. ४.२९८ )
रानताग.

**शणल**–न., वनस्पति० शणम् ( र. १०.१० ) ताग.

**शण्डक**–पु., **बिलेशयप्राणि०** ( असंसू. ७.७६-७७ )
बिळातला प्राणी.

**शत**–न., संख्या० ( ध. ४.१३७ ) शंभर संख्या.

**–कुन्द**–पु., वनस्पति० करवीरः (रा. १०.१) कण्हेर.

**–कुलीरक**-पु., **बायव्यः कीट० तद्गुणाः–असौ वातकोपनो वातज रोगान् करोति** ( सुक. ८.५-८; असंउ. ४३ )
तोंडाने विषारी दंश करणाऱ्या किड्याचे नाव. वातकोपक आहे. वातज रोग निर्माण करतो.

**–कुसुमा**–स्त्री., वनस्पति० शतपुष्पा ( चक. चसि. १२.१६ ( १ ) बडीशेप.

**–कोटि**–पु., रत्न० हीरकम् ( ध. ६.५६ ) हिरा.

**–क्रतु**–पु., देव० शतमखः इन्द्रः (चसू. १.२३) इंद्र.

**–ग्रन्थि**–स्त्री., वनस्पति० नीलदूर्वा, द्र० ‘दूर्वा’ ( रा. ८.२२६ )
दूर्वांचा प्रकार, निळी दूर्वा.

**–घ्नी**–स्त्री., आयुध० **कण्टकाचिता यष्टिः** ( इन्दु ) **अयःकण्टकाच्छन्ना महती शिला** ( सुनि. १६.५७, असंउ. २५ )
लोखंडी काटेरी मोठी शिला, काटेरी लोखंडी काठी.
कण्ठरोग० **प्रभूतैर्मांसाङ्कुरैः परिवृता तीव्रतृड्ज्वरमूर्द्धरुग्युक्ता कण्ठस्रोतसि समन्ताद्व्याप्ता या वर्तिरतिरुक्करी भवति सा रुजयाऽऽकृत्या च शतघ्नी–सादृश्यात् शतघ्नीत्युच्यते** ( असंउ. २५ )
शतघ्नी नावाचा कंठरोग. गळ्यामध्ये बरेच मांसांकुर वाढतात आणि त्यामुळे गिळण्यास त्रास, तीव्र ताप, तहान, डोके दुखणे पीडा व आकृतीवरून हे शतघ्नी नाव पडले.

**–दारुक**–पु., कीट० **अयं मुखसन्दंशविशर्धितमूत्रपुरीषविषः** ( सुक. ३.५ )
एक कीटक. हा तोंडाने दंश करतो. याच्या दंश अपानवायु मूत्र व मल यात विष असते.

**–धौत**–वि., **शतवारं धौतम्, धावितं प्रक्षालितं वा** ( चशा. ८.२४ )
शंभर वेळा पाण्याने धुतलेले ( तूप ).

**–धौतघृत**–न., **शतवारं धौतं घृतम्** ( चशा. ८.२४ ) **शतवारान् शीतजलेन धौतं फेनिलं घृतं एतज्ज्वरेषु दाहविनाशने नितरामुपयुक्तम्** ( सुउ. ३९.२८३ )
शंभर वेळा गार पाण्याने फेसाळून धुतलेले तूप. ज्वरामध्ये फार दाह होत असताना हातापायाला, डोक्याला चोळतात.

**-धौताज्य**-न., शतधौतघृतम् ( अहृसू. २६.४७ )
शंभर वेळा धुतलेले तूप.

**-नेत्रिका**-स्त्री., वनस्पति० शतावरी ( रा. ४.४३९ )
शतावरी.

**-पत्र**-पु., प्रतुदपक्षि० काष्ठकुक्कुटकः (चसू. २७.५०)
द्र० 'प्रतुद' सुतारपक्षी.
आनूपदेशे वर्तमानः पक्षि० मयूरः, शुकः, सारसः, ( चक. १.८ ) विष्किरपक्षि० दार्वाघाटः
( ड. सुसू. ४६.५९ ) द्र० 'विष्किर'
झाडी जास्त असलेल्या प्रदेशात असणारा, पदार्थ विस्कटून चोचीने खाणारे पक्षी. मोर, पोपट सारस दार्वाघाट इ०.
न., वनस्पति० कमलम् ( चसू. ४.१५;
रा. १०.२४४ )
कमळ.
रक्तपद्मम् ( ध. ४.१५२ ) लाल कमळ.

**-( पत्रा )**-स्त्री., वनस्पति० तद्गुणाः- तिक्ता, कषाया, सुरभिः, रुच्या, पित्तघ्नी, कुष्ठमुखस्फोटपित्तजदाह-नाशिनी च ( ध. ५.१५१-१५२ )
हिं.—कानवाल.
म.—कमल.
बं.— पद्म.
ता.—तमाराइ.
कमळ. कमळाचे **गुण**-कडू, कषाय, सुगंधी, रुच्य, पित्तशामक, कुष्ठ, तोंडावरचे फोड, पित्तज दाह नाशक आहे.

**-( पत्री )**-स्त्री., वगस्पति० शतपत्रा ( ध. ४.१५२ )
तांबडे कमळ.

**-पत्रक**-पु., प्रतुदपक्षि० राजशुकः
( ड. सुसू. ४६.६७ ) द्र० 'प्रतुद'
चांगल्या जातीचा पोपट.

**-( पत्रिका )**-स्त्री., वनस्पति० शतपत्रा
( ध. ५.१५१ ) शेवंती.
शतपुष्पा ( रा. ४.२ ) बडिशेप.

**-पदी**-स्त्री., बहुपदयुक्तकीट० कारुण्डा
( चक. चचि. २३.१५६,२१५ ) कर्णजलूकिका (इन्दु.असंउ.४३) सा चाष्टधापरुषा, कृष्णा, चित्रा, कपिला, पीतिका, रक्ता, श्वेताऽग्निप्रभा च, तद्दंशलक्षणानि-शोफो वेदना हृदयदाहः, श्वेताग्नि-प्रभाभ्यामेतदेव, लक्षणम्-दाहो मूर्च्छा श्वेतपिडको-त्पत्तिश्च ( सुक.८.३० ) अस्या विषे स्वर्जिकाक्षारा-दीनामागदो योज्यः ( चचि. २३.२१५ )
घोण, गोम. बरेच पाय असणारा सरपटत जाणारा विषारी किडा. त्यांचे आठ प्रकार आहेत. परुषा, कृष्णा, चित्रा, कपिला, पीतिका, रक्ता, श्वेता, अग्निप्रभा. **घोण चावल्याचे लक्षण**— सूज, वेदना, हृदयदाह, ही लक्षणे श्वेत आणि अग्निप्रभा ह्या प्रकारची घोण चावल्यामुळे होतात. दाह, मूर्च्छा, पांढरे फोडही उत्पन्न होतात. याचे विषावर स्वर्जिका क्षारादिकांचा विषनाशक योग द्यावा.
वनस्पति० शतावरी ( ध. १.२९१ )
शतावरी.

**-पद्विष**-न., शतपद्याः विषम् ( सुक. ८.४९ )
द्र० 'शतपदी' गोमेचे विष.

**-पर्वक**-पु., वनस्पति० जलगण्डीरः (सुउ. ५८.४४)
ऊस, दूर्वा.
इक्षु० द्र० 'इक्षु' ( अहृसू.५.४६ ) ऊस.

**-पर्वा**-स्त्री., वनस्पति० श्वेतदूर्वा द्र० 'दूर्वा'
( चचि. ३.२५८; चक. )
पांढऱ्या दूर्वा.

**-( पर्विका )**-स्त्री., वनस्पति० नीलदूर्वा
(रा. ८.२२६; अहृसू. ७.२५ ) द्र० 'दूर्वा )
निळी दूर्वा.
कटुका ( ध. १.३८ ) कुटकी.
वंशः ( ध. ४.१३७ ) वेळू, बांबू.
नीलदूर्वा, द्र० 'दूर्वा' ( ध. ४.१४३ )
दूर्वांचा प्रकार, निळी दूर्वा.

**-पाक**-वि., शतशः कृतः पाकसंस्कारो यस्य, सः
( चवि. ६.१७ )
शंभर वेळा शिजविलेला ( स्नेह ).

**-पाकतैल**-न., सिद्धतैल० ओषधीभिः शतवारं सिद्धं तैलम्, इदं योनिरोगे प्रशस्तम्
(चचि. ३०.१०५; सुचि. ४.२९)
शंभर वेळा औषधात सिद्ध केलेले तेल. हे योनिरोगात प्रशस्त.

**-पाकबलातैल**-न., सिद्धतैल०
सिद्धबलातेलाचे नाव. शंभर वेळा पचवलेले.

**-पादक**-पु., आग्नेयकीट० सविषोऽसौ कीटः पित्तज-रोगान् करोति ( सुक. ८.८-१२ )

किडा; या विषयुक्त किड्याने पित्तरोग उत्पन्न होतात.

**–पादी**–स्त्री., वनस्पति० **कटभी** ( रापरि. ९.३८ ) मालकांगोणी.

**–पुष्पा**–स्त्री., वनस्पति० **अनुवासनोपगगणे आस्थापनोपगगणे चैकं द्रव्यम्** ( चसू. ४.१३ )**तद्गुणाः– कटुस्तिक्तोष्णा स्निग्धा; तीक्ष्णा, दीपनी** ( भाप्र मिश्रप्रकरण ) **कफवातघ्नी, ज्वरनेत्रदोषव्रणातिसारनुत् सेयं बस्तिकर्मणि शस्यते** ( ध. २.१; रा. ४.१-४ ) **उपनाहस्वेदे उपयुक्ता** (चसू. १४.३६) **ऋतुप्रवर्तनी, योनिशुक्रविशोधनी, पुत्रप्रदा, वीर्यकरी** (का शतपुष्पावरी क)

हिं.—सोया.

**म.—बाळंतशोप.**

गु.—सुवानी भाजी–सुवादाना.

बं.—शुल्धा.

फा.—शुत–तुख्मेशूत.

आस्थापन व अनुवासनगणातील द्रव्य. **गुण**— तिखट, कडु, उष्ण, स्निग्ध, तीक्ष्ण, अग्निदीपक, कफवातनाशक, ज्वर, नेत्ररोग, व्रण, अतिसार, आर्तव प्रवर्तक, योनि व शुक्रशुद्धिकर, पुत्रदायक, वीर्यवर्धक आहे.

**तिलतुल्यबलामूलाष्टगुणसलिलाष्टांशशेषितकषायभावितानां तिलानां तैलमादाय सामान्यक्काथपरिभाषाक्काथेन चतुर्गुणेन शतशः पचेत्। एतस्य सेवनेन पुरुषः सर्वपापैर्विनिर्मुक्तः शतायुर्भवेत्** ( सुचि. १५.४०-४३ )

शतपाकीबलातैल–तीळ आणि बलामूल समप्रमाणात त्यांचा आठपट पाण्यात काढा करावा. व एकअष्टमांश तो काढा उरल्यावर त्याची तिळांना भावना देऊन क्काथ परिभाषाप्रकरणात सांगितल्याप्रमाणे ४ पट काढ्याने शंभर वेळा पचवावे. ह्या संस्कारित तेलाने माणूस सर्व पापांपासून मुक्त होऊन शंभर वर्षे जगतो.

**मिश्रेया** ( चचि. ३.२५०; सुचि. ३.५८) बडिशेप, सोफ.

**मृगाक्षी** ( रा. ७.२५७ ) कडू इंद्रावण, कडू कवंडळ.

**–पुष्पादल**–न., वनस्पति० (रापरि. ७.८२) **तद्गुणाः– मधुरं, सोष्णं, दीपनं, पथ्यं, रुचिप्रदं, पित्तकृद्वातघ्नं, गुल्मशूलजिच्च** ( रापरि. ७.८२ )

शतपुष्पादल. गुण– मधुर, उष्ण, दीपन, पथ्य, रुचिप्रद, पित्तकारक, वातशामक, गुल्म आणि शूल नाशक आहे.

**–पुष्पिका**–स्त्री., वनस्पति० **मिश्रेया** ( र. १९.७-९ ) बडिशेप.

**–पोनक**–न., चालनिका, तितउः ( असंउ. ३३ ) भगंदराचा प्रकार. चाळणीसारखी अनेक च्छिद्रे असलेला भगंदररोग. यास तितऊ म्हणतात.

**रोग० वातजभगन्दरः, शतपोनकवद्गुदस्थाने बहुच्छिद्रयुतो व्रणः** ( सुनि. ४.५; असंउ. ३३ ) द्र० '**भगन्दर**'

शतपोनक भगन्दराचा प्रकार. वातज भगन्दर. चाळणीसारखी पुष्कळ छिद्रे असणारा.

**गुह्यरोग० शूकदोषजविकारेष्वेकः, वातशोणितकोपेन मेहनं सर्वतोऽणुमुखैश्छिद्रैश्चितं भवति** ( सुनि. १४.१२ ) **तच्चिकित्सा–शतपोनकस्य लेखनं कृत्वा शोधनार्थं शोधनद्रव्यकृताया रसक्रियाया उपयोगः करणीयः, तथा रोपणकाले रोपणकषायद्रव्यकृताया रसक्रियाया उपयोगः करणीयः। किं च रोपणार्थं पृथक्पर्ण्यादिसिद्धतैलमप्युपयोक्तव्यम्** ( सुचि. २१.१४ ) **अग्निना स्रावमार्गदहनाऽनन्तरं रुजास्रावापहं स्वेदमाशु कुर्वीत। स्वेदार्थं च यथोक्तानि स्वेदद्रव्याणि, कृशरां, पायसं वोपयुंजीत। एवमेव ग्राम्यमानूपमौदकं वा मांसं स्वेदार्थमुपयोजयेत्** ( सुचि. २१.१२-१९ )

शूकदोष विकारातील एक विकार. वायु आणि रक्त यांच्या प्रकोपाने होणारा हा विकार आहे. शिश्नाला सर्व बाजूंनी बारीक बारीक छिद्रे पडतात. उपचार– प्रथम लेखन क्रिया म्हणजे ती छिद्रे खरडावी. नंतर शोधन द्रव्यांनी केलेल्या रसक्रियेचा उपयोग करावा; व व्रण भरण्यासाठी रोपण कषायाची रसक्रिया वापरावी. किंवा पिठवण इ०चे सिद्ध तेल वापरावे. वेदना व स्राव कमी व्हावा म्हणून डाग दिल्यावर शेकावे. त्यासाठी खिचडी किंवा खीर अथवा स्वेदल द्रव्याचा उपयोग करावा. तसेच गावातील पाण्यातील किंवा खूप झाडी असलेल्या प्रदेशातील प्राण्यांच्या मांसानेही शेकावे.

**–प्रसूना**–स्त्री., वनस्पति० **शतपुष्पा** ( रा. ४.२ ) बडिशेप.

**–बाहु**–पु., **वायव्यः कीटविशेषः वातरोगान् करोति** ( सुक. ८.५-८ )

किड्याचा प्रकार. हा वातप्रकृतीचा असून वातरोग करतो.

**-भावित**-वि., शतधा भावितम् ( चचि. १.(४)१९) शंभर वेळां भावना दिलेले.

**-भिषज्**-स्त्री., नक्षत्र० शततारका (असंसू. ८.९२) शततारका नक्षत्र.

**-मूला**-स्त्री., वनस्पति० शतावरी ( रा.४. ४३९ ) शतावरी.

**नीलदूर्वा द्र० 'दूर्वा'** ( रा. ८.२२७ ) दूर्वांचा प्रकार.

**-मूलिका**-स्त्री., वनस्पति० द्रवन्ती ( रा. ५.३४६ ) उंदीरकानी.

**-मूली**-स्त्री., वनस्पति० शतावरी (र. २०.८२-८५) शतावरी.

**-वल्ली**-स्त्री., वनस्पति० नीलदूर्वा, द्र० 'दूर्वा' ( ध. ४.१४३ ) दुर्वांचा प्रकार.

**-विषाणिका**-स्त्री., वनस्पति० शतावरी ( चक्र. चचि. १०.४२ ) शतावरी.

**-वीर्या**-स्त्री., वनस्पति० शतावरी ( सुसू. १९.२९; रा. ४.४३९ ) शतावरी.

**महाशतावरी** ( रा. ४.४४२ ) महाशतावरी.

**दूर्वा** ( चसू. ४.१८ ) दूर्वा.

**नीलदूर्वा, द्र० 'दूर्वा'** ( सुसू. १९.२९ ) दूर्वा.

**उत्तरापथिका, द्राक्षाभेदः, द्र० 'द्राक्षा'** ( रा. ११.७७ ) द्राक्षांचा प्रकार.

**शतमूली** ( असंचि. ७ ) शतावरी.

**-वेधिन्**-पु., वनस्पति० अम्लवेतसः ( ध. २.९६ ) अम्लवेतस.

**शतारु**-न., क्षुद्रकुष्ठ० इदं पित्तश्लेष्माधिकं, तल्लक्षणम्- रक्ताः श्यावा दाहयुक्ताः पीडाकरा बहवो व्रणाः ( चचि. ७.२६-३० )

कफपित्तदोषात्मक शतारु नावाचे एक क्षुद्र कुष्ठ. **लक्षण**— लाल काळसर दाहयुक्त, पीडा करणारे पुष्कळ व्रण होतात.

**शतारुष्क**-न., कुष्ठरोग० ( का. कुष्ठ. चि. )

कुष्ठ रोगाचा प्रकार. या नावाचे कुष्ठ. नऊ असाध्यांपैकी एक.

**शतावरी**-स्त्री., वनस्पति० ( चसू. ५.६५ ) शाक० वातपित्तसंशमनवर्गे चैकं द्रव्यम् ( सुसू. ३९.७-८; अहसू. १५.२१ ) तद्गुणाः- तिक्ता, मधुरा; शीता, स्निग्धा, वर्णौजोबलवर्धनी, स्मृतिमेधामतिकरी ( का शतावरी कल्प ) वृष्या, रसायनवरा, वातपित्तघ्नी, क्षयाऽस्रविकारघ्नी च ( ध. १.२९१-९२; रा. ४.४३७-४० ) महदल्पभेदेन सा द्विविधा, तत्र महती, सहस्रवीर्या ( सुसू. ४६.३०१ )

हिं.—सतावर.

**म.—शतावरी, आसवली.**

गु.—शतावरी.

बं.—शतमूली.

फा.—गुर्जदस्ति.

शतावरी—वातपित्तशामकवर्गातील एक. **शतावरी गुण**—कडू, गोड, शीतवीर्याची, स्निग्ध, वर्ण-ओज बलवर्धक, स्मृती मेधा करणारी, रसायनी, क्षयरक्तविकार नाशक आणि वातपित्तनाशक. शतावरीचे प्रकार दोन आहेत. महाशतावरी आणि छोटी शतावरी.

**सहस्रवीर्या, महाशतावरी** ( ध. १.२९३ ) महाशतावरी.

**-करीर**-न., शतावर्यङ्कुरम्, तद्गुणाः-सतिक्तं लघु, चक्षुष्यं, वृष्यं, दोषत्रयप्रणुत् ( असंसू. ७.१२७ ) शतावरीचे अंकुर.

गुण-कडवट, हलके, डोळे व शुक्र यांना हितकर, त्रिदोषनाशक.

**-घृत**-न., सिद्धघृत० वृष्ययोगोऽयम् ( चचि. २.(३)-१८ ) योनिरोगे उपयुक्तम् ( चचि. ८.१०५ ) रक्ताऽतिसारचिकित्सायामुपयुक्तम् ( चचि. १९.९८ )

एका सिद्ध घृताचे नाव. वृष्य कार्य करणारे, योनिरोगामध्ये व रक्तातिसारामध्ये उपयुक्त आहे.

**-पायस**-पु., पायस० शतावरीमूलश्रृतेन पयसा कृत आहारः, असौ तिमिरनाशनः ( सुउ. १७.४९ )

शतावरीची खीर. शतावरीची मुळे उकळून दुधात तयार केलेली खीर दृष्टिरोगांवर (तिमिररोग) उपयोगी.

**शतावर्यङ्कुर**-पु., कन्दशाक० शतावर्या अङ्कुरः, तद्गुणाः- तिक्तः, कफपित्तहरश्च ( सुसू. ४६.३०२ )

शतावरीचे अंकुर, कोंब. कडू व कफपित्तहारक. याची भाजी करतात.

**शताह्वक**–न., वनस्पति० फल० सेह इति 'शरका' इति च ख्यातम्, इदं दोषघ्नं-गरहारि च ( चसू. २७.१४५ )
सेह नावाच्या वृक्षाचे फळ. हे दोषनाशक व गरनाशक.

**शताह्वया**–स्त्री., वनस्पति० शतावरी ( रा. ४.४३८ )
शतावरी.

**शताह्वा**–स्त्री., वनस्पति० शतपुष्पा ( सुचि. ३७.८; ध. २.१ ) बडिशेप.
शतावरी ( रा. ४.४३८ ) शतावरी.
मिश्रेया ( चसू. ३.२० ) रानबडिशेप.

**शत्रुकण्टक**-पु., वनस्पति० घोण्टा ( रापरि. ८.२२ )
बारीक बोर.

**शत्रुपत्र**–न., वनस्पति०, अम्लवेतसपत्रम्, इदमक्षिरोगे परिषेकोपयोगि ( काखिल. १३.५९ )
अम्लवेतस. याचा काढा डोळ्यांच्या विकारात डोळ्यांवर शिंपडतात.

**शत्रुभङ्ग**-पु., वनस्पति० मुञ्जः ( रा. ८.२०५ )
मुंज, मोळ.

**शदन**–न., शातः, पातः ( अरु. अहृसू. ७.११ )
शातन, पातन, गळणे, पडणे.

**शनैर्मेह**–पु., रोग० कफजप्रमेहभेदः (चसू. १९.४-(९) )
शनैः शनैर्मन्दं मन्दं कृच्छ्रं मूत्रयति (सुनि. ६.१०)
द्र० 'प्रमेह'
कफजमेहाचे नाव. यात हळुहळु-मंदमंद, कष्टाने, लघ्वीला होते.

**शफ**–पु., भैषज्य० नखम् ( ध. ३.५८ ) नख; खुर.

**शफर**–पु., जलचरप्राणि० नादेयमत्स्यवर्गे डल्हणेन निर्दिष्टः ( ड. सुसू. ४६.११३ ) तद्गुणाः– तिक्तः, कटुः, स्वादुः, शुक्रलः, कफवातजिच्च (र. २८.७७)
द्र० 'नादेयमत्स्य'
जलचर प्राणी. माशांचा एक प्रकार. **गुण**—कडू, तिखट, गोड, शुक्रवर्धक, कफवात नाशक.

**( शफरी )**–स्त्री., मत्स्य० ( चचि. २ ( ४ ) १७ )
माशांचा प्रकार.

**शबरकन्द**–पु., वनस्पति० गृष्टि; वाराहीकन्दः ( रा. ७.१३५ )
डुक्करकंद.

**शबरोद्भव**–पु., वनस्पति० रोध्रम् ( र. ३०.६४-६५ )
रोध्र, लोध्र.

**शबल**–वि., नानावर्णः, चित्रविचित्रः (इन्दु, असंउ. ४३)
नानावर्णाचे, चित्रविचित्र रंगाचे.
पु., मूषिक० एतद्विषतः पित्तजा रोगा ग्रन्थयः कर्णिकाश्च जायन्ते ( असंउ. ४६ ) द्र० 'मूषिक'
उंदरांचा प्रकार. याच्या विषाने पित्ताचे रोग, गाठी चकंदळे होतात.
वनस्पति० चित्रकः ( रा. ६.१२५ ) चित्रक.

**–वर्ण**—पु., कर्बुरवर्णो मिश्रवर्णो वा ( सुनि. ६.२६ )
चित्रविचित्र रंगाचा.

**शब्द**–पु., सार्थो वर्णसमूहः, संकेतबलादर्थप्रकाशिका वर्णमाला (चक्र.) स चतुर्विधः दृष्टार्थोऽदृष्टार्थः सत्योऽनृतश्च ( चवि. ८.३८ )
अर्थयुक्त वर्णसमूह. संकेतशक्तीने अर्थप्रकाशक. वर्णमाला-वर्णसमूह. प्रकार चार. ( १ ) सुबोध ( २ ) दुर्बोध ( ३ ) सत्य ( ४ ) असत्य. कार्यकारणभाव स्पष्ट होणारे, व्यवहारात अर्थाची प्रचीती येणारे.
आकाशस्य गुणः, स च श्रोत्रग्राह्यो ध्वनिवर्णात्मकः, ( चशा. ४.१२; सुशा. १.४ )
आकाश पंचमहाभूतांचा गुण. कर्णेंद्रियाने समजणारा वर्णयुक्त ( स्वरूपी ) ध्वनी.
( परिव० ) नादः ( सुनि. ७.२१-२३ )
ध्वनी, नाद, निनाद.

**–तन्मात्र**–न., पञ्चतन्मात्रेष्वेकम् अनुद्भूतस्वरूपः सूक्ष्मशब्दः ( सुशा. १.४ )
पंचतन्मात्रांपैकी एक. शब्दतन्मात्रा, अव्यक्तस्वरूपी सूक्ष्मशब्द.

**–पुनरुक्त**–न., वाक्यदोष० तस्यैव शब्दस्य पुनरभिधानम्। यथा घटो घट इति ( चवि. ८.५४ )
शब्दाचा परत परत विनाकारण केलेला उपयोग. तोच तोच शब्द-वाक्य-अर्थ पुन्हा पुन्हा सांगणे.

**–प्रादुर्भाव**–पु., सशब्दता शब्दायितम् ( सुसू. १२.८ )
शब्द म्हणजे आवाज येणे. अग्निकर्मामध्ये उत्पन्न होणारा.

**–वहस्रोतस्**–न., शारीर० स्रोतोभेदः, कर्णशष्कुलीपरिच्छिन्नमाकाशम् ( मा मधुकोष.; सुनि. १.८३ )
शब्दवह स्रोतस. कानाच्या पाळीने आवृत (वेढलेला) अवकाश.

**–वाहिनी**–वि., शारीर० वाग्वाहिनी ( धमनी )
( सुनि. १.८५ )
शब्दवाहिनी धमनी. शब्दोच्चार करणारी. धमनी.
स्त्री., **कर्णगता सिरा**० ( असंशा. ६.२८ )
कर्णगतसिरा.

**–वेध**–पु., संस्कार० **मुखस्थितपारदेन नलिकया लघुधमनेन लोहादेर्धातोः सुवर्णरौप्यत्वसंजननम्**
( र. ८.९४ )
शब्दवेध. पारद संस्कारापैकी विशिष्ट संस्कारित पारा. तोंडात ठेवून नळीने हळूच शब्द करून मुशीत असलेल्या लोह इ० धातूवर फेकला तर त्याच्या संयोगाने त्या धातूचे सोने किंवा रुपे बनणे या क्रियेला शब्दवेध व त्या पाऱ्याला शब्दवेधी म्हणतात.

**–श्रव**–पु., शारीर० कर्णः ( चइ. ८.१२ ) कान.

**शब्दादिजरोग**–पु., रोग० अहितशब्दरूपादिजन्यो विकारः ( चसू. २५.१४ )
अहितकर शब्द रूप इत्यादीमुळे झालेला रोग.

**शब्दासहत्व**–न., लक्षण० **शब्दो न सह्यते इति**
( चनि. १.३३ )
शब्द सहन न होणे.

**शब्दासहिष्णुता**–स्त्री., लक्षण० शब्दासहत्वम्
( अहृसू. ११.१७ )
शब्द सहन न होणे.

**शब्दिता**–स्त्री., वनस्पति० धातकी ( ध. ३.९० ) धायटी.

**शब्देन्द्रिय**–न., शारीर० श्रवणेन्द्रियम् श्रोत्रम् ,
( सुशा. १.१९ ) श्रवणेन्द्रिय. कान.

**शम**–पु., विकारासम्भवः, विकाराणामुपशमः
( असंसू. २०.१० )
विकाराचा शम. झालेला विकार नाहीसा होणे.

( **शमी** )–स्त्री., वनस्पति० ( चक. १.८ ) **तद्गुणाः– कषाया, स्वादुस्तिक्तोष्णा** ( शीता) (र. १८.१०६) **गुरुः**; (लघुः ) **रेचनी** (र. १८.१०६ ) **केशनाशिनी, रक्तपित्ताऽतीसारनाशिनी** ( ध. ५.९५ ) **कास-श्वासभ्रमकुष्ठाऽर्शःकृमिनाशिनी** (र. १८.१०६-८) **अस्य कल्को विषजरक्ताऽऽस्रावे पाने उपयुज्यते** ( असंउ. ४७ ) **अस्य काष्ठं दन्तधावने निषिद्धम्**
( असंसू. ३.२१ )
हिं.—समी.
**म.—शमी.**
गु.—खिजडी.
बं.—शाँइ.
शमी. **गुण**—तुरट, गोड,कडु, जड, उष्ण, केशनाशक, रक्तपित्त–अतिसारनाशक, खोकला–श्वास–भ्रम–कुष्ठ–मूळव्याध व कृमि नाशक. हिचा कल्क विषापासून उत्पन्न होणाऱ्या रक्तस्रावावर पिण्याकरितां. हिची काडी दंतमंजनाला वापरू नये.
**शिम्बीधान्य**० **एतस्याः कृष्णपीतरक्तश्वेतकुशिम्बीभेदेन विविधा जातयस्ताश्च मधुराः शीतला गुर्व्यो बलघ्न्यो रूक्षणात्मिका बलिभिः सस्नेहभोज्याश्च**
( चसू. २७.३४ )
शेंगातील धान्य. काळी, पिवळी, लाल, पांढरी व हलक्या दर्जाची अशा अनेक जाती आहेत. त्या गोड, थंड, बलनाशक, रूक्ष आहेत. त्या बलवानाने स्नेहयुक्त खाव्यात.

**शमन**–न., उपक्रम० ( चसू. १.१०९; सुसू. २०.२१ ) **यदौषधं वातादिदोषान्न शोधयति तथा स्वप्रमाणस्थान्नोदीरयति विषमांश्च समीकरोति, तत् शमनम्, तत्सप्तविधम्–पाचनं, दीपनं क्षुत्तृड्व्यायामातपमारुताः** ( अहृसू. १४.६-७ )
शमन. चिकित्सेचा एक प्रकार. जे औषध वातादी विषम दोषांना शरिराबाहेर न काढता त्यांना शमविते–सम करते. शिवाय सम दोषांना वाढवीत नाही. ते शमन आहे. त्याचे सात प्रकार, १ पाचन २ दीपन ३ भूक ४ तहान ५ व्यायाम ६ ऊन्ह आणि ७ वायुसेवन.

**–गण्डूष**–पु., उपक्रम० **गण्डूषभेदः, चतुर्विधप्रकारेष्वेकः, तिक्तकषायमधुरशीतैः पटोलाऽरिष्टजम्ब्वाम्रमालतीपल्लवोत्पलमधुकक्काथसितोदकक्षौद्रक्षीरेक्षुरसघृतादिभिः शमनः** (असंसू. ३१.४)
गंडूषविधीच्या ४ प्रकारांपैकी एक प्रकार. पडवळ, कडुनिंब, जांभूळ, आंबा, जाईचे पान, कमळ व ज्येष्ठमध ह्यात खडीसाखर घालून पाणी, मध, दूध, उसाचा रस, तूप इ० बरोबर मिश्रण करून गुळणे करणे हा शमनगंडूषाचा प्रकार होय.

**–धूम**–पु., उपक्रम० **धूमभेदः, त्रिविधधूमप्रकारेष्वेकः, प्रायोगिको मध्यमश्चेत्यपरनाम्नी, स्वस्थकर्मणि वातकफसंसर्गे च उपयुज्यते**
( असंसू. ३०.४,१८ )
धूमपानविधीच्या ३ प्रकारांपैकी शमन धूमपान हा एक प्रकार आहे. प्रायोगिक आणि मध्यम हे दुसरे दोन प्रकार आहेत. स्वास्थ्य कायम राहावे आणि

वातकफदोषाचा संसर्ग असेल तर तो जावा म्हणून उपयुक्त.

**–नस्य**–न., उपक्रम० नस्यभेदः, नस्य, **नीलिकाव्यङ्ग-केशदोषाऽक्षिराजिषु शमनं नस्यं हितम्** ( अहृसू. २०.४ )
शमनरूप नस्य. आंगावर उठणारे निळे डाग, वांग, केसांचे दोष, डोळ्यात रेषा उमटणे ह्या विकारात उपयुक्त असते.

**–स्नेह**–पु., **स्नेहप्रकारेष्वेकः स्नेहः** ( अहृसू. १६.१९ )
स्नेहनाचा प्रकार.

**शमनीय**–वि., **शमने हितम्, व्याधिशामकम्** ( चचि. ३.१६०-१६१ )
रोगशामक, रोगशमनाला हितकर.

**–द्रव्यगण**–पु., **औषधिसमूह**० (काखिल. २.५७-५८) **दशमूलशटीरास्नावयस्थापंचकोलशार्ङ्गेष्टारोहिणी-पाठासरलदेवदारुमुस्ताऽमृतावृश्चिकालीकर्कटा-दुरालभात्रायन्ती इत्येवमादीनि शमनीयानि**
दशमुळे, कचोरा, रास्ना, हिरडा, पंचकोल, सागरगोटा, जटामांसी, पहाडमूळ, सरळदेवदार, देवदार, नागरमोथा, गुळवेल, विंचवी, काकडशिंगी, धमासा, त्रायमाण इ० औषधांचा शमन द्रव्य-समूहात समावेश आहे.

**शमल**–न., पापम् ( इन्दु. असंउ. ९.३ ) पाप.
शकृत्, **शमलशिथिलभावः, द्रुतपुरीषत्वम्** ( इन्दु. असंउ. ४९ )
मळ, विष्ठा, मळाचा ढिलेपणा, मळाचा पातळपणा.

**शमी**–स्त्री., ( चक. १.८ ) शमी, शेंगा.

**–पत्रा**–स्त्री., **वनस्पति० लज्जालुः** ( ध. ४.१०९ )
लाजाळु.

**–फल**–न., **फल० तद्गुणाः–मधुरमुष्णं, गुरु, रूक्षं, केशघ्नम्** ( चसू. २७.१६०; सुसू. ४६.१९३ )
शमीचे फळ. **गुण**— गोड, उष्ण, जड, रुक्ष, केशनाशक.

**–यन्त्र**–न., **यन्त्र० अर्शोयन्त्रसमं किन्तु च्छिद्ररहितं यन्त्रम्, तच्च अर्शःप्रपीडनार्थमुपयुज्यते** ( अहृसू. २५.१९ ) द्र० '**यन्त्र**'
यन्त्राचे नाव. मूळव्याध पहाण्याच्या यंत्रासारखेच परंतु छिद्र नसलेले. हे सुद्धा मूळव्याध मोड दाबण्या-करिता उपयोगी आहे.

**शम्पाक**–पु., **वनस्पति० आरग्वधः** ( चचि. १०.१९-२२; सुउ. ३९.२४५ ) बाहवा.
**चतुरङ्गुलः** (चक्र. चसि. ३.६१) बाहवा.
**किरमालकः** ( ड. सुचि. ३१.५ ) बाहवा.

**शम्बर**–पु., **वनस्पति० अर्जुनः** ( रा. ९.१९१ )
अर्जुनसादडा.
**लोध्रः** ( रा. ६.२३८ ) लोध्र, रोध्र.
**जङ्घालप्राणि०** ( धपरि. ३ )
जंघालप्राणी. मांड्या जाड पुष्ट असलेला प्राणी.
**जाङ्गलमृग० असौ लघुप्रकृतिः** ( चसू. ५.५ ) **अस्य मांसरसो गर्भस्थापनार्थमुपयुज्यते** ( चशा. ८.२४ )
हिं.—साम्बर, बारहसिंगा.
**म.—साम्बर.**
बं.—शम्बर.
सांबर. हा तरळ प्रकृतीचा आहे. याचे मांस गर्भ-स्थापनेसाठी उपयोगात आणतात.
न., **जलम्** ( रा. १४.३१७ ) पाणी.

( **शम्बरी** )–स्त्री., **वनस्पति० दन्ती** ( चक. १२.३ )
दाती, रेचक वनस्पती.
**द्रवन्ती** ( ध. १.२२९ ) उंदीरकानी.
**मूषककर्णी** ( रापरि. ३.२२ ) उंदीरकानी.
**सुतश्रेणी** ( रा. ४.१६ ) उंदीरकानी.

**–पादप**–पु. **वनस्पति० लोध्रः** ( ध. ३.१७५ )
लोध्र, रोध्र.

**शम्बुक**–पु., **कीट० कोषस्थजन्तुः, तद्गुणाः–प्राणनाशनः, तेन दष्टस्य वेगज्ञानं सर्पवद्भवति; तथा च सान्नि-पातिका रोगा भवन्ति, दंशस्तु क्षाराग्निदग्धवत्, वर्णेन रक्तपीतसितारुणः** ( सुक. ८.१५-१८; असंउ.४३ )
कीटक. कोशात असणारा जंतु. प्राणनाशक. चावला तर सापाप्रमाणे वेग येतात. दंशस्थळी अग्नीने भाजल्याप्रमाणे तांबडे, निळे काळे फोड होतात.

**शम्बूक**–**आवर्तकोशः, 'साङ्कुला' इति लोके** ( ड. सुसू. ४६.१०८.११० ) **दंष्ट्रानखविषः** ( सुक. ३.५ )
ज्याचे वरचे आवरण भोवऱ्यासारखे वाटोळया वळणाचे आहे असा प्राणी. याच्या दात व नखे यात विष असते. सांखुला. गोगलगाय.
**आवर्तयुक्तो मत्स्य०** ( सुसू. ४६.१०८-११० )

भोवऱ्यासारखी वाटोळी वळणे असलेल्या शरिराचा मासा.

**भैषज्य० क्षुद्रशङ्खः, लघुशङ्खः** ( सुनि. ४.८; रा. १३.२४६ ) बारीक शंख.

**शम्बूकादिवर्ति**-स्त्री., पारदयोग० **सिध्दाञ्जन० शुक्रार्मतिमिरपिल्लान्हन्ति** ( र. २३.५९-६० )
पारा, शिसे इ० औषधयुक्त कांडी. शुक्र, अर्म, तिमिर, पिल्ल अशा नेत्ररोगांची नाशक.

**शम्बूकावर्त**-पु., रोग० **भगन्दरभेदः, वायुः प्रकुपितः प्रकुपितौ पित्तश्लेष्माणौ परिगृह्याऽधो गत्वा पूर्ववदवस्थितः पादाङ्गुष्ठाग्रप्रमाणां सर्वलिङ्गां पिडकां जनयति, साऽस्य तोददाहकण्ड्वादीन् वेदनाविशेषाञ्जनयति, अप्रतिक्रियमाणा च पाकमुपैति, व्रणश्च नानाविधवर्णमास्रावं स्रवति, पूर्णनदीशम्बूकावर्तवच्चात्र समुत्तिष्ठन्ति वेदनाविशेषाः, तं भगन्दरं शम्बूकावर्तमित्याचक्षते** ( सुनि. ४.८ ) द्र० ' भगंदर '
भगंदराचा प्रकार. त्रिदोषाने होणाऱ्या भगंदर रोगाचे नांव. प्रकुपित वायु पित्तकफासह गुदमार्गामध्ये पायाच्या अंगठ्याएवढ्या सांनिपातिक चिन्हांनी युक्त अशा पिडका ( फोड ) उत्पन्न करतो. त्या ठिकाणी टोचणी, दाह, कंडू वगैरे विशेष वेदना होतात. उपचार न केल्यास पिकतो व फोडातून नाना तऱ्हेचे स्राव स्रवतात.
पुराने तुडुंब भरलेल्या वाहत्या नदीमध्ये ज्याप्रमाणे मध्येच भोवरा ( गोलगोल पाणी वहाणे ) निर्माण होतो, त्यासारखे गुदाचे आसपास दुखते.

**शम्भु**-पु., ऋषि० **आदिमचन्द्रसेनादिषु सप्तविंशतिसंख्याकेष्वन्यतमो रससिद्धिप्रदायको रसाचार्यः** ( र. १.२-५ )
रसाचार्य. २७ ऋषींपैकी एक.

**-ज**-पु., खनिज० **पारदः** ( र. १.६६ ) पारद.

**-वल्लभ**-न., वनस्पति० **पुण्डरीकम्** ( ध. ४.१४८ ) कमळ.

**शम्या**-स्त्री., **दक्षिणहस्तेन वादनम्** ( चनि. ७.७ (१) उजव्या हाताने वाद्य वाजविणे.

**शम्याक**-पु., वनस्पति० **कर्णिकारः** ( ध. १.२२१; अहसू. १५.२ )
बाहवा.
**आरग्वधः** ( असंचि. १.६३-६४ ) बाहवा.

**-मज्जा**-स्त्री., **आरग्वधमज्जा** ( सुसू. ४६.२०७ ) बाहवामगज.

**शयन**-न., ( परिव० ) **स्वापः** ( सुसू. ४६.५०५ ) झोंप.
**शय्या, तच्च सपादपीठं, नात्युच्छ्रितं नातिनीचपादं, प्रधानमृद्वास्तरणोपपन्नं, प्राक्शीर्षकं, शुक्लपटोत्तरीयं प्रशस्तम्** ( चसि. ३.३३-३४ )
झोपण्याचे अंथरूण, खाली पाय टेकण्याला चौरंगासारखे आसन, फार उंच नाही फार ठेंगणा नाही अशा पलंगावर मऊ गादी असलेले, पांढरी चादर घातलेले व पूर्वेकडे डोके ( उसे ) असलेले आंथरूण प्रशस्त होय.

**शयनेप्सु**-वि. **स्वप्तुमिच्छुः, सुषुप्सुः** ( सुउ. ३९.४३ ) झोपण्याची इच्छा असणारा.

**शय्या**-स्त्री., **शयनम्** ( अहसू. १४.१० ) अंथरूण.

**-दोष**-पु., **शयनस्य दोषः** ( सुचि. ३६.२९-३० ) पालथे, उताणे, पोटाशी गुडघे घेऊन वगैरे झोपणे. ( बस्ती घेतांना ).

**शय्यासन**-न., **शय्या एवाऽऽसनम्** ( सुचि. २४.८१ ) पसरलेले अंथरूण.

**शर**-पु., वनस्पति० ( चचि. १(३).३; सुसू. १२.४ )
**तद्गुणाः-मधुरस्तिक्तोऽल्पोष्णो बल्यो वीर्यकरोऽल्पवातकरः, कफघ्नो भ्रान्तिमदनाशकः** (ध. ४.१३५) **मूत्रकृच्छ्राऽश्मरीदाहाऽस्रक्षयपित्तजरोगजित्** ( भाप्रमिश्र. ४.१६१-१६२ )
हिं.—रामशर.
**म.-शर.**
बं.—शर.
शर. ( दर्भांचा प्रकार. ) बाणगवत. गुण-मधुर, कडु, अल्प-उष्ण, बलकर, वीर्य उत्पन्न करणारे, अल्पवातकर आहे. कफनाशक असून भ्रम आणि उन्मत्तपणा शामक आहेत. मूत्रकृच्छ्र, मूतखडा, दाह, रक्तक्षय, पित्तरोग शामक आहे.
**शल्य० लोहादिनिर्मितो बाणः, स च द्विविधः कर्णी, श्लक्ष्णश्च** ( सुसू. २६.५-७ )
लोहाचा बाण, भाला. दोन प्रकारचा. १ कान असलेला २ गुळगुळीत.

**-काण्ड**-पु., **शरैषिका** ( सुशा. ४.७२; असंशा. ८.१५ )
शर-बाण नावाच्या गवताचे कांडे,

**–पत्र**–पु., वनस्पति० कुशः ( रा. ८.२०९ )
दर्भाचा प्रकार.

**–पुङ्ख**–पु., शरगुणसन्धानस्थानम् ( सुसू. ७.१४ )
बाणाला मागच्या बाजूस लावलेले पीस. धनुष्याच्या दोरीला बाणाचे जे टोक लावून नेम धरतात ते टोक, ती जागा.

**यन्त्र० शरपुङ्खाऽऽकारा शल्यचालनार्था शलाका** ( सुसू. ७.१४ )
शल्य हालविण्याकरिता किंवा त्याचे स्थानांतर करण्याकरिता उपयोगात आणावयाची बाणाच्या पंखाच्या आकाराची सळई.

न., **यन्त्र० शरकर्तरी** ( अहृसू. २५.३१ )
बाण कापणारी कातरी.

**–( पुङ्खा )**–स्त्री., **वनस्पति० तद्गुणाः– कटुस्तिक्ता, कषाया** ( भाप्र. ) **उष्णा ( लघुः )** ( भाप्र. ) **वातरुजापहा, कृमिघ्नी; यकृत्प्लीहगुल्मव्रणविषापहा, विशेषतस्तु प्लीहनाशिनी** ( भाप्र. मिश्र. ४.२१०; रापरि. ४.६ ) **तद्बीजं सतक्रपीतं मूषिकविषनाशनम्** ( असंउ. ४६ )

हिं.—सरफोंका.
**म.—उन्हाळी.**
बं.—बननील.
ता.—कोल्लुक्कवेल्लपि.

शरपुंखा ( उन्हाळी ) **गुण**—तिखट, कडू, तुरट, उष्ण, वातवेदनानाशक, कृमिनाशक, यकृत–प्लीहा गुल्म–व्रण–विषनाशक, विशेषेकरून प्लीहानाशक आहे. शरपुंखेचे बी ताकाबरोबर प्याल्याने उंदराचे विष नाहीसे करते.

**–पुङ्खमुख**–न., **शलाकायन्त्र०** ( असंसू. ३४.१५ )
शरपुंखमुख नावाचे सळईचे यंत्र. बाणाच्या मुळाच्या आकाराचे तोंड असलेले सळईयंत्र.

**–( पुङ्खमुखा )**–स्त्री., **शलाकायन्त्र०** ( असंसू. ३४.१५ )
पहा 'शरपुंखमुख'.

**–पुङ्खमुखयन्त्र**–न., **शलाकायन्त्र०** ( अहृसू. २५.३३ )
पहा 'शरपुंखमुख'.

**–लोमन्**–पु., ऋषि० **रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः** ( चसू. १.११ ) **यज्जपुरुषीयाध्याये विवदमानानामेकतमऋषिः** ( चसू. २५.८ )
शरलोमा नावाचा महर्षी. रोगनाशाच्या विचारविनिमयाकरिता हिमालयाच्या परिसरात जमलेल्या महर्षींतील एक. पुरुषाची उत्पत्ति ह्या विषयावर झालेल्या चर्चेत भाग घेणारांपैकी एक ऋषि.

**शरण**–न., **गृहम्** (चशा. ८.९; सुचि. ५.१५ ) घर. गृह.

**शरण्या**–स्त्री., **रेवत्या विंशतिनाम्नामेकतमं नाम** ( का बालग्रहचि. )
रेवती ग्रहाच्या वीस नावांपैकी एक.

**शरद्**–स्त्री., ऋतु० (चसू. ६.७) **आश्विनकार्तिकौ, कार्तिकमार्गशीर्षौ वा शरद्वटकौ मासौ** (सुसू. ६.६-१०) **कन्यातुले शरद्** ( हे.अहृसू. ३.१-२ ) **अत्र लवणरसो बलवान् भवति** ( सुसू. ६,६-१० ) **शरदि आचरणविधिः** ( सुउ. ६४.१३-१८ ) **वर्षाशीतोचिताङ्गानां शरदारम्भे सूर्यसंतापेन सहसा तप्तानां नराणां वर्षासंचितं पित्तं शरदि कुप्यति। तत्र पित्तजयार्थं तिक्तघृतं विरेचनं रक्तमोक्षं च कुर्वीत। क्षुधितः सन् लघु तिक्तं स्वादु कषायं चान्नं भजेत्। शालयो मुद्गः सितो आमलकं, पटोलं, मधु, जाङ्गलं च मांसं सेवनीयम्। पानादिष्वमृतोपमं हंसोदकं नाम निर्मलं, दोषघ्नं जलमुपयोक्तव्यम्। एतद् हंसोदकं सूर्यकिरणैर्दिवातप्तं चन्द्रकिरणैर्निशि शीतीकृतं तथैवाऽगस्त्योदयनिर्विषमस्ति; तन्नाऽभिष्यन्दि न वा रूक्षम्। प्रदोषे चन्दनोशीरकर्पूरमुक्तास्रग्वसनैश्चोऽज्वलः सन् सौधेषु ज्योत्स्नाम् उपसेवेत। शरदि तुषारं क्षारान्, दधि, तैलं, वसामातपं तीक्ष्णमद्यं, दिवास्वप्नं, सौहित्यं, पुरोवातं च परित्यजेत्।** ( अहृसू. ३.४९-५४ )
शरद ऋतु. आश्विन, कार्तिक ह्या दोन महिन्यांचा काल. किंवा कार्तिक मार्गशीर्ष या दोन महिन्यांचा काल. कन्या व तूळ संक्रांतीचा काल. शरद ऋतु. या वेळी लवण रस बलवान असतो. या दिवसात शरिरातील वर्षाऋतूत ( पावसाळ्यात ) साठलेले पित्त प्रकुपित होते. त्या पित्ताला थंड असलेली शरिरे शरद ऋतूतील उन्हाने एकाएकीच संतप्त झाल्यामुळे अगोदरच जिंकण्यासाठी कडूरसामध्ये सिद्ध केलेली तुपे. विरेचक औषधे, सिरामधून पुरेसे रक्त काढून टाकणे हे विधी करावे. या दिवसात चांगली भूक लागली म्हणजे कडू, गोड, तुरट रसाचे पचावयास

हलके असे भोजन घ्यावे. त्यामध्ये विशेषतः तांदूळ, मूग, साखर, आवळे, कडू पडवळ, मध, जांगल–प्राण्यांचे मांस हे असावे. प्यावयास दिवसा सूर्य–किरणांनी तापलेले, व वापरण्यास अमृतासारखे, रात्री चंद्रकिरणानी थंड झालेले, तसेच अगस्ति ताऱ्याच्या उदयामुळे निर्विष झालेले असे हंसोदक बुळबुळीत ओलावा निर्माण करणारे किंवा रूक्ष नसल्याने वात किंवा कफ करीत नाही म्हणून वापरावे. संध्याकाळी व रात्री चंदन, वाळा, कापूर यांची उटी व माळ तसा मोत्यांचा हार व वस्त्रांनीही सुशोभित होऊन चांदण्यात गच्चीवर बसावे. ह्या ऋतूमध्ये पावसाचे तुषार अथवा दवबिंदु अंगावर घेणे, पोटभर जेवण, क्षार, दही, तेल, वसा, उन्ह, तीक्ष्ण मद्य, दिवसा झोप, पूर्वेकडचा वारा ही घेऊ नयेत.

**( शरत्–काल )**–पु., शरद् (र.१३.१३-१९) शरद ऋतु.

**( शरत् )–पद्म**–न., **वनस्पति० पुण्डरीकम्** ( ध. ४.१४८ )
पांढरे कमळ.

**–पुष्प**–न., **वनस्पति० आहुल्यम्** ( रापरि. ४.३४ )
तरवड, तरोटा.

**शरभ**–पु., **प्राणि० हिंस्रपशुः** ( सुउ. ३९.१५१ ) **महाशृङ्गी हरिणः, अष्टापद उष्ट्रप्रमाणो महाशृङ्गो जाङ्गलमृगः** ( चसू. २७.४५ ) **अयं आहारद्रव्य-त्वेनोपयोज्यः प्रकृतिलघुः** ( चसू. ५.५; सुउ. ३९.१५१) **काश्मीरे प्रसिद्धः** (सुसू. ४६.५४)
काश्मीरमधील हिंस्र पशूचे नाव. आठ पायांचा, उंटा-एवढा, मोठ्या शिंगांचा कमी पाण्याच्या प्रदेशात राहाणारा प्राणी. हा स्वभावतः चपळ. काश्मिरात प्रसिद्ध आहे. आहार द्रव्य म्हणून ह्याचे मांस उपयुक्त.

**शरारि**–पु., **जलचरपक्षि० शराली** ( चसू. २७.४२ ) **धवलस्कन्धो दीर्घचञ्चुः पक्षिविशेषः** ( सुसू. ८.४)
शराली नावाचा पाण्यामध्ये असणारा पक्षी. याचा खांदा पांढरा व चोच लांब असते. ( पाणकोंबडा ).

**शरारिमुख**–न., **शस्त्र० षडङ्गुलप्रमाणदीर्घं केशप्रमाण-धारं विस्रावणोपयोगि शस्त्रम्** ( सुसू.८.३-४ )
शरारिमुखशस्त्र. सहा अंगुळे लांबीचे केसाइतक्या प्रमाणाची धार असणारे रक्तस्रावाला उपयोगी शस्त्र. शरारि पक्ष्याच्या चोचीसारखे. पहा 'शरारि,'
आ. को. म. १७९

**शरारीमुख**–पु., **जलचरपक्षि० खदिरवर्णः 'गिर्गराटी' इति लोके** ( ड. सुसू. ४६.१०५-१०६ )
शरारीमुख, जलचरपक्षीविशेष. हा खैराच्या लाकडाच्या रंगासारखा रंग असलेला पक्षी. गिर्गराटी असेही याचे एक नाव आहे.

**शरार्यास्य**–न., **शस्त्र० शरारिमुखं नाम शस्त्रम्** ( अहृसू. २६.९ )
पहा 'शरारिमुख'

**शराव**–पु., **मृन्मयपात्र० पलाष्टकमापनपरिमाणपात्रम्** ( सुनि. ६.१५ )
परळ, मातीचे भांडे, बत्तीस तोळे प्रमाणांचे माप.
**वायव्यः कीटविशेषः** ( असंउ. ४३ )
कीटकांचा एक प्रकार.

**–कुर्द**–पु., **वायव्यकीट० वातकोपनोऽसौ वातरोगान करोति** ( सुक. ८.५-८ )
शरावकुर्द. कीटकांचा एक प्रकार. हा वातप्रकृतीचा व वातप्रकोपक आणि वातरोग करणारा.

**–मात्रा**–वि., **शरावप्रमाणा** ( सुनि. ६.१५ )
बत्तीस तोळे, माप.

**–संपुट**–पु., **शरावयोः सम्पुटो–युग्मम्, पुटम्–पात्रद्वयोभयमुखसंयोजनम्** ( सुचि. ४०.१९ )
दोन परळांची तोंडे एकमेकाला जोडून केलेली जोडी. जोड परळ. पुट म्हणजे दोन पात्रांची तोंडे एकमेकाला जोडणे.

**शराविका**–स्त्री., **मेहपिडका० इयं श्यावा क्लेदवेदनायुक्ता निम्नमध्योन्नतौष्ठा शरावसंस्थानप्रमाणा वर्तते** (चसू. १७.८३; सुनि. ६.१५) **द्र० 'प्रमेहपिडका'**
शराविका नावाची मधुमेहातील पुळी. काळसर, क्लेद वाहाणारी, वेदना असणारी, मध्यभागी खोलगट-पणा आणि बाजूच्या कडा उंच असणारी. हिचा आकार शरावा ( परळा ) प्रमाणे असतो.

**शरांश**–वि., **पञ्चमभागम्** ( र. १७.६५-६६ )
पाचवा हिस्सा.

**शरीर**–न., **शीर्यते इति शरीरम्, देहः, आपादमस्तक-माकृतिः** ( चवि. ८.११९; सुसू., १५.३ ) **आत्मनो भोगायतनम्, तच्च पञ्चमहाभूतविकारात्मकम्** ( चसू. १.४२ )

जे क्षिजते ते शरीर. पाच महाभूतांच्या पासून बनलेली एक विकृति. देह. पायांपासून मस्तकापर्यंतची आकृति. आत्म्याचे भोगस्थान.

**–कम्प**–पु., लक्षण० देहकम्पः ( चइ. ११.१० ) शरीर कापणे.

**–क्लेद**–पु., लक्षण० देहस्य क्लेदः, स्वेदः ( चसू. २६.४३ (६)

शरिराला ओलावा येणे, घाम.

**–गुण**–पु., **शरीरे निष्पद्यमानो गुणः, शरीरधातुः** ( चशा. ६.१७ )

शरिरात उत्पन्न होणारा गुण. शरिराचा धातु.

**–चिन्ता**–स्त्री., **जीर्णाऽजीर्णनिरूपणादिका, ( चिन्ता ) कीदृशं मे शरीरं किञ्च मयाऽस्य हितमनुष्ठितमित्यादिरूपो विमर्शः** ( हे. अहसू. २.१ )

आहारादिकांचे सुयोग्य पचन झाले किंवा नाही याचा विचार. माझे शरीर कसे आहे, मी शरिरास हितकारक असे काय केले इ० विचार.

**–छिद्र**–न., **स्रोतांसि सिरा धमन्यो रसवाहिन्यो नाड्यः पन्थानोऽयनानि मार्गाः शरीरच्छिद्राणि संवृताऽसंवृतानि स्थानान्याशयाः क्षया निकेताश्चेति शरीरे धात्ववकाशानां लक्ष्याऽलक्ष्याणां नामानीति** ( असंशा. ६.५० )

शरिरातील छिद्रे—स्रोतसे, शिरा, धमन्या, रसवाहिन्या, नाड्या, मार्ग, अयन, रंध्रे, आच्छादित व खुली स्थाने, आशय, क्षय, निकेत आणि धातूतील पोकळ्या व स्पष्ट दिसणारी न दिसणारी अशा स्वरूपाची व नावाची अनेक छिद्रे आहेत.

**–जक्लेद**–पु., **शरीरे जायमानं क्लिन्नत्वम्** ( चनि. ४.७ )

शरिरामध्ये निर्माण झालेला ओलावा.

**–ज्ञान**–न., **शरीरस्य ज्ञानम्** ( चसू. २९.७ )

शरिराचे ज्ञान.

**–तत्त्व**–न., **शरीरस्य तत्त्वम्, शरीरस्य रक्तादिरूपस्य स्वभावरूपं तत्त्वम्** ( चशा. ६.३ )

रसरक्तादिघटित शरिराच्या नैसर्गिक स्थितीचे ज्ञान.

**–दौर्गन्ध्य**–न., लक्षण० देहस्य दुर्गन्धत्वम् ( चसू. ३.२९ )

शरिराला येणारा वाईट वास.

**–पुष्टि**–स्त्री., **शरीरस्य पोषणम्, इदं मांसस्य प्राकृतं कर्म** ( सुसू. १५.५(१)

शरिराचे पोषण, मांसधातूचे हे स्वाभाविक कार्य आहे.

**–प्रमाण**–न., **शरीरस्योत्सेधविस्ताराऽऽयामादिमानम्, तत्र पादौ चत्वारि षट् चतुर्दशाङ्गुलानि, जङ्घे त्वष्टादशाङ्गुले षोडशाङ्गुलपरिक्षेपे च, जानुनी चतुरङ्गुले षोडशाङ्गुलपरिक्षेपे, त्रिंशदङ्गुलपरिक्षेपावष्टादशाङ्गुलावूरू, षडङ्गुलदीर्घौ वृषणावष्टाङ्गुलपरिणाहौ, शेफः षडङ्गुलदीर्घं पञ्चाङ्गुलपरिणाहं, द्वादशाङ्गुलपरिणाहो भगः, षोडशाङ्गुलविस्तारा कटी, दशाङ्गुलं बस्तिशिरः, दशाङ्गुलविस्तारं द्वादशाङ्गुलमुदरं, दशाङ्गुलविस्तीर्णे द्वादशाङ्गुलायामे पार्श्वे, द्वादशाङ्गुलं स्तनान्तरं, द्व्यङ्गुलं स्तनपर्यन्तं, चतुर्विंशत्यङ्गुलविशालं, द्वादशाङ्गुलोत्सेधमुरः, द्व्यङ्गुलं हृदयम्, अष्टाङ्गुलौ स्कन्धौ, षडङ्गुलावंसौ, षोडशाङ्गुलौ प्रबाहू, पञ्चदशाङ्गुलौ प्रपाणी, हस्तौ द्वादशाङ्गुलौ, कक्षावष्टाङ्गुलौ, त्रिकं द्वादशाङ्गुलोत्सेधम् अष्टादशोङ्गुलोत्सेधं पृष्ठं, चतुरङ्गुलोत्सेधा द्वाविंशत्यङ्गुलपरिणाहा शिरोधरा, द्वादशाङ्गुलोत्सेधं चतुर्विंशत्यङ्गुलपरिणाहमाननं, पञ्चाङ्गुलमास्यं, चिबुकौष्ठकर्णाक्षिमध्यनासिकाललाटं चतुरङ्गुलं, षोडशाङ्गुलोत्सेधं द्वात्रिंशदङ्गुलपरिणाहं शिरः; इति पृथक्त्वेनाऽङ्गावयवानां मानमुक्तम्। केवलं पुनः शरीरमङ्गुलिपर्वाणि चतुरशीतिः। तदायामविस्तारसमं समुच्यते। तत्रायुर्बलमोजः सुखमैश्वर्यं वित्तमिष्टाश्चाऽपरे भावा भवन्त्यायत्ताः प्रमाणवति शरीरे; विपर्ययस्त्वतो हीनेऽधिके वा** ( चवि. ८.११७; सुसू. ३५.१२ )

शरिराची उंची, रुंदी व लांबी यांचे प्रमाण–पाय प्रत्येकी चार अंगुळे उंच, सहा अंगुळे रुंद व चौदा अंगुळे लांब. पोटऱ्या प्रत्येकी अठरा अंगुळे लांब व सोळा अंगुळे घेराच्या असतात. गुडघे प्रत्येकी चार अंगुळे लांब असतात व त्यांचा घेर सोळा अंगुळांचा असतो. प्रत्येक मांडीचा घेर तीस अंगुळे व लांबी अठरा अंगुळे असते. अंडकोश सहा अंगुळे लांब व आठ अंगुळे घेराचे असतात. शिश्नाची लांबी सहा अंगुळे व घेर पाच अंगुळे असतो. स्त्रियांचा गुह्य भाग ( भग ) बारा अंगुळे घेराचा असतो. कमरेचा विस्तार सोळा अंगुळे असतो. बस्तीचा वरचा भाग दहा अंगुळे असतो. पोट बारा अंगुळे असते. बरगड्यांची रुंदी दहा अंगुळे व लांबी बारा अंगुळे असते. दोन स्तनांच्या मधील भाग बारा बोटे व प्रत्येक स्तनाची रुंदी दोन अंगुळे असते. वक्षःस्थळाची

लांबी चोवीस अंगुळे व उंची बारा अंगुळे असते. हृदय दोन अंगुळे असते. प्रत्येक खांदा आठ अंगुळे व आंस सहा अंगुळे असतात. भुजा सोळा अंगुळे, हात पंधरा अंगुळे, हाताचा तळवा दहा अंगुळे व बगला आठ अंगुळे असतात. कंबरेतील त्रिकाची उंची बारा अंगुळे व पाठीची उंची अठरा अंगुळे असते. मानेची उंची चार अंगुळे व तिचा घेर बावीस अंगुळे असतो. मुखाची (चेहऱ्याची) उंची बारा अंगुळे व त्याचा घेर चोवीस अंगुळे असतो. तोंड पाच अंगुळे. हनुवटी व ओठ, कान व डोळ्यांच्या मधील जागा, नाक व ललाट हीं प्रत्येकी चार चार अंगुळे लांब असतात. डोक्याची उंची सोळा अंगुळे व त्याचा घेर बत्तीस अंगुळे असतो. याप्रमाणे शरिराच्या प्रत्येक अवयवाचे निरनिराळे प्रमाण सांगितले. एकंदर शरिराची उंची चौऱ्याऐंशी (८४) अंगुळे असते. शरिराचे प्रामाण्यावर म्हणजे लांबी, रुंदी, उंची इत्यादींच्या समप्रमाणावर आयुष्य, बल, ओज, सुख, ऐश्वर्य, वित्त, ही अवलंबून आहेत.

**–प्रलय**–पु., (परिव०) **देहनाशः, देहचेतनाधातुनाशः, मृत्युः** (सुशा. ६.२०)
शरिराचा व चैतन्यशक्तीचा नाश; मृत्यु.

**–भेद**–पु., **शरीरनाशः** (सुउ. ४७.१४) शरीरनाश.

**–मध्य**–न., **स्रोतो० महास्रोतः** (असंसू. २२.१५)
शरिराचा मध्यभाग, महास्रोतस.

**–यन्त्र**–न., **यन्त्रस्थानीयो देहः** (असंशा. ६.६८)
शरीररूपी यंत्र, शरीर हेच यंत्र.

**–यात्रा**–स्त्री., **देहवर्तनम् आयुष्क्रमणम्** (का. सिद्धि)
आयुष्यभर शरीर चालू राहाणे, जीवन चालणे. जीवनयात्रा.

**–वश**–पु., **शरीरसामर्थ्यम्, शरीरप्रभावः** (सुशा. ८.८)
शरिराचा प्रभाव, शरिराचे सामर्थ्य, सर्व गोष्टी शरिराच्या स्वाधीन असणे.

**–विचय**–पु., **शरीरस्य विचयनम्, शरीरस्य प्रविभागशः परिज्ञानम्** (चशा. ६.३)
शरिराच्या प्रत्येक विभागाचे ज्ञान. शारीर संकलन. **अध्यायसंज्ञा०** (चशा. ६.१) या नावाचा अध्याय यात शरिरातील सर्व अवयवादींच्या वस्तुस्थितीचे वर्णन आहे.

**–विबन्धन**–न., **शरीरस्य धमनीजालविबन्धनम्** (सुशा. ९.९)
धमन्यांच्या जाळ्याने झालेले शरीरबंधन.

**–वृत्ति**–स्त्री., **शरीरस्य सम्यक्कार्यम्** (कासू. २२.३४)
शरिराचे सुयोग्य कार्य.

**–वृद्धि**–स्त्री., **लक्षण० शरीरस्याऽभिवृद्धिः** (का शा. ४)
शरिराची वाढ.

**–संख्या**–स्त्री., (चशा. ७.३) **शरीरशब्दोऽयं समुदायवृत्तिरवयवेष्वपि वर्तते, तेन अवयवानामपि संख्या शरीरसंख्येत्यभिहितम्** (ड. सुशा. ५.१)
शरीर हा शब्द सर्व शरिराप्रमाणे शरीरावयवाला सुद्धा आहे. शरिरातील अवयवादिकाची संख्या सांगणे. उदा० त्वचा सहा आहेत.

**–संख्याव्याकरण**–न., **अध्यायसंज्ञा०** (सुशा. ५.१)
अध्यायाचे नाव. यात अंगप्रत्यंगांची संख्या सांगितली आहे.

**–संख्याशारीर**–न., **अध्यायसंज्ञा०** (चशा. ७.१)
अध्यायाचे नाव. यात अवयवांच्या संख्या आहेत.

**–संपद्**–स्त्री., **शरीरसौष्ठवम् शरीरस्वाभाविकबलोत्कर्षः** (चशा. ६.१३)
शरीरसंपत्ति. शरिराचा स्वाभाविक गोंडसपणा, डौलदारपणा.

**–सदन**–न., **लक्षण० अङ्गसादः** (चसू. १४.१४)
अंग गळणे.

**शरीराधिकार**–पु., **शरीरविचयविषयकम् अधिकरणं नाम प्रकरणम्** (चशा.६.२०) शरीरविषयक प्रकरण.

**शरीरान्त**–पु., **शरीराग्रभूतो हस्तपादादिः** (चक्र. चइ. ९.६)
हातपाय इ० शाखा, शरिराचे शेवटचे भाग.

**शरीराभिनिर्वृत्तिज्ञान**–न., **शरीरस्याऽभिनिर्वृत्तिः तस्याः ज्ञानम्, तद्यथा शरीरं शुक्रशोणितसंयोगादिभ्य उपजायते इति ज्ञानम्** (चक्र. चसू. २९.७)
शरिराच्या उत्पत्तीचे ज्ञान. जसे शरीर शुक्र व आर्तव संयोगाने उत्पन्न होते हे कळणे.

**शरीरावयव**–पु., **शरीराङ्गोपाङ्गप्रविभागः** (चसू. २७.३३४; सुसू. १४.३) **तत्संख्यानं- त्वचः कला धातवो मला दोषा यकृत्प्लीहानौ फुप्फुस उण्डुको हृदयमाशया अन्त्राणि वृक्कौ**

**स्रोतांसि कण्डरा जालानि कूर्चा रज्जवः सेवन्यः संघाताः सीमन्ता अस्थीनि सन्धयः स्नायवः पेश्यो मर्माणि शिरा धमन्यो योगवहानि स्रोतांसि इति** ( सुशा. ५.५ )
शरिराची अंगे प्रत्यंगे यांची माहिती–त्यांची गणती–कातडी, कला, धातु, मलदोष, यकृत, प्लीहा, फुप्फुस, उण्डुक, हृदय, आशय, आतडी, वृक्क, स्रोतसे, कंडरा, जाल, कूर्चा, रज्जु, सेवनी, संघात, सीमन्त, हाडे, सांधे, स्नायु, पेशी, मर्मे, शिरा, धमनी, योगवाही स्रोतसे.

**शरीरायास**–पु., **शारीरः श्रमः** ( असंसू. ३.६२ )
शरिराचे श्रम, व्यायाम.

**शरीरिन्**–पु., **शरीरमस्यास्तीति शरीरी** (चक्र. चसू. १.६) **आत्मा, जीवात्मा, चेतनाधातुः, शरीरधारणसमर्थः पुरुषः** ( सुशा. १.१६ )
ज्याला शरीर आहे तो शरीरी. आत्मा, जीवात्मा, चेतना धातु, शरीर धारणास समर्थ पुरुष.

**शरीरोपचय**–पु., **शरीरस्य सम्यक् पुष्टिः देहसंवर्धनम्** ( सुशा. १०.३१ )
शरिराची सुयोग्य वाढ. पुष्टी.

**शरेन्दुक**–पु., **वनस्पति० भूतृणम्** ( रापरि. ८.४२ )
रोहिसगवत.

**शरेषीका**–स्त्री., **शरपुष्पस्य नाली शरिकेति प्रसिद्धा** ( चसू. ५.२३ )
बाण गवताच्या फुलाचा दांडा.

**शर्करक**–पु., **वनस्पति० मधुजम्बीरः** ( ध. ५.१८ )
साखरलिंबु. गोडलिंबु.

**शर्करा**–पु., **सिकता** ( असंशा. ३ ) वाळू.

**( शर्करा )**-स्त्री., **आहारद्रव्य० इक्षुविकारः सिता** ( चसू. ४.१८ ) **खण्डसिता, खण्डशर्करा** ( चसू. ४.१६-१७ ) **सितोपला, 'तवराज' इति लोके** ( ड. सुसू. ४५.१६२ ) **मधुशर्करा** ( ध. २.१०६ रा. १४.१६१ ) **तद्गुणाः–मधुरा, शीता; गुरुतरा, स्निग्धा, वृष्या** (सुसू.४५-१६२) **पित्तघ्नी, सर्वदाहरक्तपित्तच्छर्दिमूर्च्छातृषाश्रमरक्तदोषभ्रान्तिकृमिकोपप्रणाशिनी** ( ध. २.१०४; रा. ४२.१०४ ) **इक्षुविकाराणां श्रेष्ठतमा** ( चसू. २५.३८ ) **ज्वरहरगणे, दाहप्रशमनगणे, शोणितस्थापनगणे च प्रोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१६-१८ ) **धूमपानप्रयोगे एकं द्रव्यम्** ( चसू. ५.२१ ) **विमलजाता मत्स्यण्डिकाखण्डशर्करा उत्तरोत्तरं शीताः स्निग्धा गुरुतरा, मधुरतरा, वृष्या, रक्तपित्तप्रशमनास्तृष्णाप्रशमनाश्च भवन्ति । यथा यथैषां वैमल्यं वर्धते तथा तथा स्नेहगौरवशैत्यानि सरत्वं च वर्धन्ते** ( सुसू. ४५.१६२-६३ ) **उत्कृष्टा–गुणवती शर्करा, सारस्थिता, सुविमला, निःक्षारा च ज्ञेया** ( सुसू. ४५.१६४ ) **शर्करा मुखे क्षारादिदाहे कवलग्रहणार्थमुपयुज्यते** ( सुचि. ४०.६७-६८ )
हिं.—मिश्री, चीनी.

**म.—साखर.**
शर्करा म्हणजे साखर. हे एक आहारद्रव्य आहे. उसापासून तयार होते. सिता, खंडसिता, खंडशर्करा, सितोपला, तवराज, मधुशर्करा इ. नावे हिला आहेत. मधापासून तयार झालेली साखर–गुण–गोड, शीत, पचावयास अधिक जड, स्निग्ध, शुक्रधातूला हितकर आहे.
सामान्य साखरेचे गुण— गोड, पित्तशामक, सर्व तऱ्हेचा दाह, रक्तपित्त, ओकारी, मूर्च्छा, तृष्णा, श्रम, रक्तदोष, भ्रम, कृमि वाढणे यांचा नाश करणारी आहे. उसाच्या पदार्थांमध्ये फार श्रेष्ठ, ज्वरहारक, दाहशामक, रक्तस्राव कमी करणाऱ्या धूम्रपानाच्या औषधीगणातील एक औषध. साखर जसजशी शुद्ध तसतशी अधिक थंड, स्निग्ध, जड, गोड, शुक्राला हितकर व रक्तपित्तशामक आणि तहान शामक होते. सारक गुणही वाढतो. उत्तम साखर—सारयुक्त, स्वच्छ, क्षार ( खारटपणा ) नसलेली. क्षारादिकांनी तोंड भाजले तर गुळण्या करण्यास साखर उपयुक्त.

**पक्वभाण्डसूक्ष्मखण्डम्, घटखर्परखण्डादिः** ( सुसू. ३६.३ )
मडक्याचे बारीक तुकडे, खापराचे तुकडे.

**वालुकाभेदः** ( चक. १.८ ) वाळु, वालुका.

**रोग० मूत्राघातप्रकारः, अश्मरीभेदः मूत्रशर्करा** ( चसू. १९.४ ( १ ) **वायुनाऽणुशो भिन्नाऽश्मरी एवानुलोमे च मारुते सिकतेव मूत्रेण सह च्यवते** ( असंनि. ९.१८ ) **मूत्रपथात् क्षरमाणः सूक्ष्मः सिकतासदृशोऽश्मा** ( सुचि. ७.१७) **बस्तिगताश्मरी वातभिन्ना शर्करेत्युच्यते** ( ड. सुसू. ३८.१२-१३ ) **वायुना भिद्यमानस्य पित्तेन पच्यमानस्य श्लेष्मणो**

**भिन्ना अवयवाः शर्करेति संज्ञिताः** (सुउ. ५९.१२) **शर्करालक्षणम्–सुवर्णसदृशास्तथा सर्षपसन्निभाः,** (का. मूत्रकृच्छ्रचि.) **शिलाजतु चिरसंभूतामश्मरीं शर्करां च भिनत्ति** (सुचि. १३.१६) **शर्करादि-प्रतीकारे वीरतर्वादिगणः उपयुज्यते।**

(सुसू. ३८.१२-१३)

मूत्राघात व मूतखड्याचा प्रकार. वाळूसारखे बारीक बारीक कण लघवीतून जाणे. मूत्रमार्गाने बारीक बारीक वाळूसारखे कण मूत्राबरोबर जाणे. बस्ती (मूत्राशय) मध्ये असलेला मूतखडा वायूच्या आघाताने फुटून त्याचे बारीक बारीक रेवेसारखे तुकडे होतात. कफाचे वायूने तुकडे होऊन पित्ताने पचवले जाऊन जे भाग होतात त्यांना शर्करा-कण-रेव असे म्हणतात. ते पित्ताच्या घटकांनी परिपक्व केले जातात. बारीक कण–कदाचित पिवळसर, मोहरीसारखे. चिकित्सा–शिलाजित हे यावर अप्रतिम औषध आहे. तसेच वीरतर्वादि अर्जुन इत्यादी गणाची औषधेही उपयोगी आहेत.

**आहरणयोग्यः रोग० मूत्रशर्करा, पादशर्करा, दन्तशर्करा चाऽऽकर्षणीयाः** (सुसू. २५.११-१२) खरडून बाहेर काढण्याच्या विकारांची नावे. मूत्र-शर्करा, पादशर्करा, दन्तशर्करा.

**दन्तरोग० दन्तशर्करा** (सुचि. २२.३६) **दन्ताना-मप्रक्षालनाद्योऽन्नादिमलः श्लेष्मा वा वातेन शोषितः सन् पूतिगन्धिः स्थिरीभूतश्च भवति। स एव दन्तशर्कराख्यः** (असंउ. २५) **द्र० ' दन्तरोग ', ' दन्तशर्करा '**

दन्तशर्करा. दात न धुतल्यामुळे दातांवर जो अन्ना-दिकांचा मल, कफ वायुकडून सुकविला जाऊन दुर्गंधीयुक्त घट्ट फटीतून राहातो तो.

**नेत्ररोग० वर्त्मशर्करा, वर्त्माश्रयोऽयं रोगः** (सुउ. १३.१६) **अर्कक्षीरलेशेनेव कूर्चीकपिण्डेनेव चाचिता तारा दृष्टिर्वा** (असंउ. १७) **अस्मिन् रोगे छेदपूर्विका लेखनचिकित्सा कार्या** (सुउ. १३.१६) एका नेत्ररोगाचे नाव, वर्त्मशर्करा. पापणीला होणारा रोग. काळ्या बुबुळावर किंवा बाहुलीवर रुईच्या दुधाच्या किंवा फाटलेल्या दुधाच्या कणांसारखे कण निर्माण होतात असा रोग. या रोगात छेद घेऊन लेखन चिकित्सा करावी.

**आसुत० शर्करासवः, पाण्डुरोगे पानार्थं प्रशस्तः** (सुउ. ४४.३६)

शर्करासव, पांडुरोगात पिणे चांगले.

**शर्करा**–स्त्री., (चसू. ४.१८) साखर.

**–वर्त्मन्**–न., **नेत्ररोग० वर्त्मशर्करा द्र० ' शर्करा '** (सुउ. १.४१)

वर्त्मशर्करा, नेत्ररोग.

**शर्कराक्ष**–पु., **ऋषि० रोगाऽपहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः** (चसू. १.१२)

शर्कराक्ष नावाचे ऋषि. रोगनाशनाच्या विचार-विनिमयाकरिता हिमालयाच्या परिसरात जमलेल्या महर्षींपैकी एक.

**शर्करापहरण**–न., **मूत्रादिमार्गे सक्तायाः शर्कराया अपहरणम्** (सुचि. ७.३५)

मूत्रमार्गात व इतरत्र अडकलेली रेव (वाळूसारखे बारीक कण)

**शर्कराम्बु**–न., **शर्करायुक्तं जलम्** (सुसू. १२.३३)

साखरयुक्त पाणी.

**शर्करार्बुद**–न., **क्षुद्ररोग० तल्लक्षणम्–श्लेष्मा, मेदस्तथा-ऽनिलो मांससिरास्नायूः प्राप्य ग्रन्थिं कुर्वन्ति। असौ भिन्नो मधुसर्पिर्वसानिभमत्यर्थमास्रावं स्रावयति। तत्राऽनिलो वृद्धिं गतो मांसं विशोष्य ग्रथितां शर्करां जनयेत्। ततः सिरा दुर्गन्धं क्लिन्न-मत्यर्थं नानावर्णं च रक्तं सहसा स्रवन्ति** (सुनि. १३.२५-२८) **मेदोऽर्बुदवदुपक्रम्योऽयं रोगः** (सुचि. २०.१७; सुचि. १८.४१-४३)

क्षुद्ररोगाचे नाव. कफ, मेद, वायु, हे मांस, शिरा, स्नायु यांच्यावर आघात करून गाठ निर्माण करतात. फुटल्यावर गाठीतून मध, तूप, वसा, याप्रमाणे स्राव येतो.

यामध्ये बिघडलेला वायु मांसाला सुकवून खड्या-प्रमाणे मोठे कण निर्माण करतो. तेव्हा एकाएकी सिरातून दुर्गंधयुक्त, चिकट, नाना रंगाचा रक्त-स्राव होतो. मेदोजन्य अर्बुदाप्रमाणे म्हणजे मेदाच्या आवाळूसारखे उपचार करावेत.

**शर्करोदक**–न., **शर्करायुक्तं जलम्** (असंसू. १०.४६)

साखरपाणी.

**शर्मन्**–न., **सुखम्** (असंशा. ९.२८; अहृसू. ४.३०)

सुख.

(**शर्म**)–**कर**–वि., **सुखकरम्** (सुउ. ५५.५३)

सुखकर, सुख देणारे.

**शर्व**–पु., **देवता० शिवः, रुद्रः** (चचि. ३.१५) शंकर.

**शर्वरी**–स्त्री., रात्रिः ( असंउ. ४१ ) रात्र.
वनस्पति० हरिद्रा ( असंचि. ७ ) हळद.

**शर्वाक्ष**–पु., वनस्पति० रुद्राक्षः ( रापरि. ११.१५ )
रुद्राक्ष.

**शलभ**–पु., कीट० (चवि. ३.७(३) ) **अस्य दंशे वातपित्तहरी क्रिया कर्तव्या** ( चचि. २३.२११ )
टोळ. कीटाचा प्रकार. याचे दंशस्थानी वातपित्तहर चिकित्सा करावी.

**शलाका**–स्त्री., यन्त्र० **मार्गान्वेषिणी लोहादिमयी यष्टिः** ( चसि. ९.५४ ) **शलाकायन्त्राणि नानाप्रकाराणि, नानाप्रयोजनानि यथायोगपरिणाहदीर्घाणि च; तेषां गण्डूपदसर्पफणशरपुङ्खबडिशमुखे द्वे द्वे, एषणव्यूहनचालनाहरणार्थमुपदिश्येते; मसूरदलमात्रमुखे द्वे किंचिदानताग्रे स्रोतोगतशल्योद्धरणार्थम्; षट् कार्पासकृतोष्णीषाणि, प्रमार्जनक्रियासु; त्रीणि दर्व्याकृतीनि खल्लमुखानि, क्षारौषधप्रणिधानार्थं; त्रीण्यन्यानि जाम्बववदनानि, त्रीण्यङ्कुशवदनानि षडेवाग्निकर्मस्वभिप्रेतानि; नासार्बुदहरणार्थमेकं कोलाऽस्थिदलमात्रमुखं खल्लतीक्ष्णौष्ठम्; अञ्जनार्थमेकं कलायपरिमण्डलमुभयतो मुकुलाग्रं; मूत्रमार्गविशोधनार्थमेकं मालतीपुष्पवृन्ताग्रप्रमाणपरिमण्डलम्** (सुसू. ७.१४) **शलाकाः पञ्च कनकरजतताम्रलोहोद्भवा अङ्गुली च । तत्राद्ये प्रसादनेऽञ्जने स्नेहने च, मध्या लेखने, अन्त्ये रोपणे, मृदुत्वादङ्गुल्येव प्रधानम्, अन्तःसरुजेऽक्षिण सैव प्रयोज्या, शेषा दशाङ्गुला राजमाषस्थूलाः सुश्लक्ष्णास्तनुमध्या मुखयोर्मुकुलाकाराः कलायपरिमण्डलाश्च** ( असंसू. ३२.११ )
शलाका, सळई. निरनिराळ्या धातूंची निरनिराळे मार्ग शोधण्याच्या कामी उपयोगी पडणारी. त्या नाना प्रकारच्या अनेक उपयोगांच्या त्याप्रमाणे अनुरूप लांबी व घेर असलेल्या असतात. त्यापैकी गांडूळ, नागाची फणा, बाणाचे मूळ व मासे धरण्याचा गळ यांच्या आकाराची दोन दोन यंत्रे, आत पू व शल्यांचा शोध करणे, शल्य वर करणे व बाहेर ओढून काढणे, अन्य स्थानी नेणे याकरिता सांगितली आहेत. मसुराच्या डाळीएवढ्या तोंडाची दोन. किंचित वाकलेल्या तोंडाची स्रोतसातील शल्य काढण्याकरिता, कापसाचा फाया लावलेली सहा. स्रोतोगत दोष अथवा पू इत्यादी स्वच्छ करण्याकरिता, पळीसारखी क्षार औषधे ठेवण्याकरिता तीन. दुसरी तीन जांभळाच्या आकाराचे टोक असलेली, तीन अंकुशासारखी ही सहा डाग देण्याकरिता. नाकातले आवाळू काढण्याकरिता बोराच्या अठळीच्या पाकळीसारखे तोंड व उखळीसारखे खोलगट मध्ये व शेवटी धार असलेली. अंजनाकरिता एक, वाटाण्यासारखी गोल, कळीसारखी दोन्ही बाजूला टोके असलेली. मूत्रमार्ग शुद्ध करण्याकरिता एक, मालतीच्या फुलाच्या देठाच्या टोकाएवढे गोल टोक असलेली. शलाकांचे प्रकार पाच—सोने, चांदी, ताम्र, लोह, अंगुली. त्यांपैकी सुवर्णाची व चांदीची सळई प्रसादन, अंजन आणि स्नेहन करण्याला उपयोगी. तांब्याची सळई लेखनकार्यासाठी उपयोगी असून तांबे व लोखंडाची रोपणासाठी उपयुक्त असतात. मृदुत्वामुळे अंगुली ही प्रमुख आहे. डोळ्यामध्ये होणाऱ्या त्रासासाठी अंगुलीच योजावी. बाकी सर्व उरलेल्या सळया दहा अंगुळे लांबीच्या चवळीप्रमाणाने स्थूल, गुळगुळीत, मध्ये पातळ, टोकाशी कळ्यांप्रमाणे व वाटाण्यासारख्या गोल असाव्यात.

–**यन्त्र**–न., यन्त्र० **शलाका** ( सुसू. ७.१४; अहसू. २५.२८ )
शलाका नावाचे यंत्र. सळई.

**शलाकाग्र**–न., **शलाकाया मुखम्** ( असंसू. ३७.१६ )
सळईचे तोंड.

**शलाकाधिष्ठान**–न., **शलाकानां स्थानम्, यथा पाणिपादशलाकाया अधिष्ठानम् चत्वारि पाणिपादशलाकाऽधिष्ठानानि** ( चशा. ७.६ )
सळईचे स्थान. जसे हात पाय यांच्या सळयांचे स्थान, हात पाय यांच्या हाडाच्या सळयांची चार स्थाने.

**शलाकिन्**–वि., **शलाका शूकः, शूकयुक्तः ( यवः )** ( सुउ. ११.११ )
सळईच्या आकाराचे कुसळ, कुसळ असलेला जव.

**शलाटु**–पु., **आमफलम्** ( सुसू. ४३.३ )
**कोमलं फलम्** ( ड. सुउ. ४०.७३ )
कच्चे फळ, कोवळे फळ.
वनस्पति० **कोमलं बिल्वफलम्** ( सुउ. ४०.७३; ध. १.१०६ )
कोवळे बेलफळ.
**कोमलं जम्बूफलम्** ( सुउ. ४०.७३ )
कोवळे जांभूळ.

–वर्ग–पु., द्रव्यगण० कुम्भीकखर्जूरकपित्थबिल्ववनस्पतीनां वर्गः, असौ नाडीव्रणरोपणार्थमुपयुज्यते (सुचि. १७.२७-२८) कोवळ्या फळांचा वर्ग. उंडीण, खजूर, कवठ, बेल यांचा गट. नाडीव्रण रोपणासाठी उपयोगी.

शलूल–पु., प्राणि० शल्लकः (धपरि. ६.३७) साळई.

शल्य–न., सर्वशरीराबाधकरं शल्यम्, तत्र शल्यं नाम विविधतृणकाष्ठपाषाणपांशुलोहलोष्टाऽस्थिबालनखपूयाऽऽस्रावदुष्टव्रणान्तर्गर्भाश्च (सुसू. १.७) 'शल' 'श्वल' इति आशुगमने धातू, तयोराद्यस्य शल्यमिति रूपम्; 'शल' हिंसायां, रुजायां वा (ड); (सुसू. २६.३,५) तद्विविधम्, शारीरमागन्तुकं च; तत्र शारीरं दन्तरोमनखादि धातवोऽन्नमला दोषाश्च दुष्टाः; आगन्त्वपि शारीरशल्यव्यतिरेकेण यावन्तो भावा दुःखमुत्पादयन्ति तावन्तोऽभिप्रेति। अधिकारो हि लोहवेणुवृक्षतृणशृङ्गास्थिमयेषु, तत्रापि विशेषतो लोहेष्वेव, विशसनार्थोपपन्नत्वाल्लोहस्य, लोहानामपि दुर्वारत्वादणुमुखत्वाद्दूरप्रयोजनकरत्वाच्च शर एवाधिकृतः। स च द्विविधः, कर्णी श्लक्ष्णश्च, प्रायेण विविधवृक्षपत्रफलपुष्पतुल्याकृतयो व्याख्याताः, काश्चिदपराश्च व्यालमृगपक्षिवक्त्रसदृशाः। सर्वशल्यानां तु महतामणूनां वा पञ्चविधो गतिविशेषः ऊर्ध्वमधोऽर्वाचीनस्तिर्यगृजुरिति। तानि शल्यानि वेगक्षयात्प्रतिघाताद्वा त्वगादिषु व्रणवस्तुष्ववतिष्ठन्ते, धमनीस्रोतोऽस्थिविवरपेशीप्रभृतिषु वा शरीरप्रदेशेषु; तद्द्विविधं सामान्यं वैशेषिकं च, श्यावं पिडकाऽऽचितं शोफवेदनावन्तं मुहुर्मुहुः शोणिताऽऽस्राविणं बुद्बुदवदुन्नतं मृदुमांसं च व्रणं जानीयात् सशल्योऽयमिति सामान्यम्; वैशेषिकं तु त्वग्गते शल्ये विवर्णः शोफो भवत्यायतः कठिनश्च; मांसगते शोफाऽभिवृद्धिः शल्यमार्गोऽनुपसंरोहः पीडनाऽसहिष्णुता चोषपाकौ च; पेश्यन्तरस्थेऽप्येतदेव चोषशोफवर्जम्; सिरागते सिराध्मानं सिराशूलं सिराशोफश्च; स्नायुगते स्नायुजालोत्क्षेपणं संरम्भश्चोग्रा रुक् च; स्रोतोगते स्रोतसां स्वकर्मगुणहानिः; धमनीस्थे सफेनं रक्तमीरयन्ननिलः सशब्दो निर्गच्छत्यङ्गमर्दः पिपासा हृल्लासश्च जायन्ते; अस्थिगते विविधवेदनाप्रादुर्भावः शोफश्च; अस्थिविवरगतेऽस्थिपूर्णताऽस्थिनिस्तोदः प्रबलसंहर्षश्च सन्धिगतेऽस्थिवच्चेष्टोपरमश्च; कोष्ठगते आटोपाऽऽनाहौ व्रणमुखात् मूत्रपुरीषाऽऽहारदर्शनं च मर्मगते मर्मविद्धवत् चेष्टा। सूक्ष्मगतिषु शल्येष्वेतान्येव लक्षणान्यस्पष्टानि भवन्ति। महान्त्यल्पानि वा शुद्धदेहानामनुलोमसन्निविष्टानि रोहन्ति, विशेषतः कण्ठस्रोतसिरात्वक्पेश्यस्थिविवरेषु; दोषप्रकोपव्यायामाभिघाताऽजीर्णेभ्यः प्रचलितानि शल्यानि पुनर्बाधन्ते। तत्र, त्वक्प्रनष्टे स्निग्धस्विन्नायां मृन्माषयवगोधूमगोमयमर्दितायां त्वचि यत्र संरम्भो वेदना वा भवति तत्र शल्यं विजानीयात्, स्त्यानघृतमृच्चन्दनकल्कैर्वा प्रदिग्धायां त्वचि शल्योष्मणाऽऽशु विसरति घृतमुपशुष्यति चालेऽऽपो यत्र, तत्र शल्यं विजानीयात्; मांसप्रनष्टे स्नेहस्वेदादिभिः क्रियाविशेषैरविरुद्धैरातुरमुपपादयेत्, कर्शितस्य तु शिथिलीभूतमनवबद्धं क्षुभ्यमाणं यत्र संरम्भं वेदनां वा जनयति, तत्र शल्यं विजानीयात्; कोष्ठास्थिसन्धिपेशीविवरेष्ववस्थितमेवमेव परीक्षेत; सिराधमनीस्रोतःस्नायुप्रनष्टे खण्डचक्रसंयुक्ते याने व्याधितमारोप्याशु विषमेऽध्वनि वाहयेत् यत्र संरम्भो वेदना वा भवति, तत्र शल्यं विजानीयात्; अस्थिप्रनष्टे स्नेहस्वेदोपपन्नान्यस्थीनि बन्धनपीडनाभ्यां भृशमुपाचरेत्, यत्र संरम्भो वेदना वा भवति, तत्र शल्यं विजानीयात्, सन्धिप्रनष्टे स्नेहस्वेदोपपन्नान् सन्धीन् प्रसरणाकुञ्चनबन्धनपीडनैर्भृशमुपाचरेत् यत्र संरम्भो वेदना वा भवति, तत्र शल्यं विजानीयात्, मर्मप्रनष्टे त्वनन्यभावान्मर्मणामुक्तं परीक्षणं भवति। सामान्यलक्षणमपि च हस्तिस्कन्धाश्वपृष्ठपर्वतद्रुमाऽऽरोहणधनुर्व्यायामद्रुतयाननियुद्धाऽध्वगमनलङ्घनप्लवनप्रतरणव्यायामैर्जृम्भोद्गारकासक्षवथुष्ठीवनहसनप्राणायामैर्वातमूत्रपुरीषशुक्रोत्सर्गैर्वा यत्र संरम्भो वेदना वा भवति, तत्र शल्यं विजानीयात्। यस्मिन् देशे तोदादयः सुप्तता गुरुता भवन्ति, यत्र बहुशो घट्टते, शूयते, रुज्यते, आतुरो यं देशमभीक्ष्णं परिरक्षति, तत्र बहुशः संवाह्यमानः शल्यं विनिर्दिशेत्। निःशल्यस्य लक्षणम्–अल्पाऽऽबाधं नीरुजं निरुपद्रवं, प्रसन्नं, मृदुपर्यन्तं निराघट्टमनुन्नतमातुरव्रणमेषण्या यथामार्गं सर्वतः प्रसाराकुञ्चनाद् दृष्ट्वा चिकित्सकस्तन्निःशल्यमिति निर्दिशेत्। हेतुभेदेनान्तःस्थ-

शल्याऽवस्था–अस्थ्यात्मकं शल्यं भज्यते, अन्तश्च शीर्यते । शार्ङ्गमायसं प्रायो निर्भुज्यते । यदि दार्क्ष-वैणवतार्णानि न निर्ह्रियन्ते, तर्हि वार्क्षादीनि शल्यानि देहिनां रक्तं मांसं च क्षिप्रं पचन्ति । कानकं राजतं ताम्रं रैतिकं त्रपुसीसकमयं शल्यं पित्ततेजः-प्रतापनाच्चिरस्थानाद्विलीयन्ते । अन्ये ये स्वभाव-शीता मृदवो मतास्ते द्रवीभूताः सन्तः शरीरे धातुभिरेकत्वं यान्ति । विषाणदन्तकेशास्थिवेणु-दारूपलानि मृण्मयानि शल्यानि च शरीरे न विशीर्यन्ते ( सुसू. २६.१-२२ )

सर्व शरिरात कोठेही जे खुपते व पीडा करते ते शल्य. नाना प्रकारचे गवत, लाकूड, दगड, धुळीचे कण, लोखंड, मातीचे ढेकूळ, हाड, केस, नख, पू, इतर स्राव, दुष्ट व्रण व गर्भिणीचा गर्भ ही सर्व शल्येच होत.

शल् आणि श्वल् हे दोन धातु लौकर जाणे या अर्थी आहेत. त्यांपैकी शल् धातूपासून शल्य शब्द झाला. शल् चा दुसरा अर्थ पीडा किंवा हिंसा करणे असा आहे.

शल्य २ प्रकारचे—(१) शारीर आणि (२) आगंतुक. ( १ ) **शारीरशल्य**— दात, केस, नखे इ० धातु. अन्नमल आणि दुष्ट झालेले दोष.

( २ ) **आगंतुशल्य**— शारीर शल्याखेरीज इतर जे कोणतेही भाव दुःखोत्पादक असतात ते सर्व आगंतु शल्य होत.

शारीर शल्यांमध्ये लोह म्हणजे धातु हे शल्यरूप विशेष होत. त्यातही पुन्हा लोखंड हा धातु विशेष होय. कारण तो धातु बाणांच्या रूपाने उपयोगात आणला जातो व बाण हा शरीरविच्छेदक, निवारण करण्यास कठीण, सूक्ष्ममुखाचे असून पुष्कळ वेळा युद्धादीमध्ये उपयोगात आणला जात असतो. म्हणून शर किंवा बाणाला शल्यामध्ये महत्त्व दिले गेले आहे. ते दोन प्रकारचे असतात. कान असलेले आणि गुळ-गुळीत पण तीक्ष्ण टोकाचे. बाणांचे आकार नाना प्रकारच्या झाडांच्या पाने, फुले, फळे यांच्यासारखे असतात. काही बाण सर्प, पशु, पक्षी यांच्या तोंडाच्या आकाराचेही असतात.

**शल्याची गती**— मोठी किंबा लहान शल्ये ५ प्रकारच्या गतीने प्रविष्ट होतात. वर, खाली, बाजूला तिर्यक व सरळ अशा त्या गति होत. ती शल्ये शरिरात शिरताना वेग क्षीण झाला किंवा आतील अस्थिमांसादींचा अडथळा आला तर त्वचादींमध्ये झालेल्या व्रणातच किंवा धमनी, स्रोतसे, अस्थीची पोकळी, पेशी वगैरेतही अडकतात. शल्ययुक्त व्रणाची लक्षणे— सामान्य आणि विशेष अशी दोन प्रकारची असतात. **सामान्य व्रण लक्षण**— काळसर, पुळ्यांनी व्याप्त, सूज आणि वेदनायुक्त, वारंवार रक्तस्राव होणारा, बुडबुड्यासारखा फुगून वर आलेला, मऊ मांसयुक्त असतो. **विशेष व्रण लक्षण**— (१) त्वक्गतशल्य व्रणात वाईट वर्णाची लांबट व कठीण सूज असते. (२) **मांसगत शल्य व्रणात**– सूज अधिक वाढलेली, त्याचा मार्ग भरून येत नाही, दाबल्यास सहन होत नाही, दाह व पिकणे. (३) **पेशीगत शल्य व्रण**— दाह व सूज फक्त नसते इतर सर्व लक्षणे वरील प्रमाणेच असतात. (४) **शिरागत शल्य व्रण**— शिरा फुगणे, त्यात शूल व त्यांची सूज ही लक्षणे. (५) **स्नायुगत शल्य व्रण**— स्नायूंचे जाळे सारखे उडत राहणे, त्याचा क्षोभ होणे, व अत्यंत पीडा होणे. (६) **स्रोतोगत शल्य व्रण**— त्या त्या स्रोतसाची कार्यक्षमता नष्ट होते. (७) **धमनीगत शल्य व्रण**— वायु शब्द करीत फेसाळ रक्तासह बाहेर पडतो व आंग दुखणे, तहान व उम्हासे येणे ही लक्षणे होतात (८) **अस्थिगत शल्य व्रण**— नाना प्रकारच्या वेदना होतात व सूज येते. (९) **अस्थीच्या पोकळीत शल्य व्रण**— हाड भरून आल्यासारखे, त्यात टोचणी आणि वायूमुळे आंगावर खूप रोमांच येतात. (१०) **संधिगत शल्य व्रण**— अस्थिगताप्रमाणेच लक्षणे होऊन हालचाल थंडावते. (११) **कोष्ठगत शल्य व्रण**— गुडगुड शब्द, पोट फुगणे व व्रणातून मूत्र, मल आणि अन्नही बाहेर येणे. (१२) **मर्मगत शल्य व्रण** — मर्मस्थानी भोसकल्याप्रमाणे त्याची हालचाल होते.

शल्याचा प्रवेश अल्प असेल तर हीच लक्षणे अस्पष्ट होतात. शल्यांचा प्रवेश बराच असला किंवा थोडा असला तरी ती जर अनुलोम मार्गाने शिरली असतील व देह शुद्ध असेल तर व्रण भरून येतात. विशेषतः कंठमार्ग, शिरा, त्वचा, पेशी आणि अस्थि ह्यांच्या

पोकळीत असलेले अनुलोम शल्याचे व्रण भरून येतात. पण दोषांचा प्रकोप, व्यायाम, अभिघात, अजीर्ण ह्या कारणांनी शल्ये हलवली गेल्यास बाधाकर होतात.

**शल्यस्थाननिश्चिती—त्वचेत लपलेले** शल्य शोधण्यासाठी त्वचेला शेकावे आणि माती, शेणाचा चुरा, जव, गहू यांचे पीठ जोराने चोळावे जेथे क्षोभ, वेदना भासेल तेथे शल्य आहेसे समजावे. किंवा त्वचेवर घट्ट तूप ओली माती किंवा चंदनाचे गंध यांचा लेप घालावा. तूप पातळ होणे किंवा लेप वाळणे ह्या गोष्टी त्वरित झालेल्या दिसतील तेथे शल्य आहेसे समजावे. **मांसगत शल्य—**स्नेह-स्वेदादि क्रिया केल्यावर कृश झालेल्या रोग्याच्या शरिरातील शल्य स्वस्थानातून शिथिल होऊन स्थानभ्रष्ट होते व सभोवती लाली, दाह वगैरे क्षोभ निर्माण करते तेथे ते शल्य आहेसे जाणावे. याच पद्धतीने कोठा, हाडे, संधी, पेशी आणि पोकळ भागातील शल्येही शोधून काढावी. **शिरा, धमनी, स्नायु व स्रोतसांतील शल्य** शोधण्यासाठी मोडके चाक असलेल्या गाडीत रोग्याला बसवून ती गाडी खाच खळगे असलेल्या मार्गातून वेगाने न्यावी. ज्या ठिकाणी क्षोभ व वेदना होतील तेथे शल्य आहेसे जाणावे. **हाडातील शल्य** शोधण्यासाठी शंका असलेल्या हाडाला बांधून, दाबावे म्हणजे जेथे क्षोभ व वेदना होतील तेथे शल्य जाणावे. **सांध्यातील शल्य—** सांध्याला स्नेह, स्वेद करून बांधावा व दाबावा. ही क्रिया बऱ्याच वेळा करावी म्हणजे क्षोभ आणि वेदना होऊन शल्याचे ठिकाण कळते. **मर्मातील शल्य—**मर्माघाताने जी लक्षणे होतात, त्यावरून ओळखता येते. शल्याचा सामान्यतया शोध घेण्यासाठी हत्तीवर, घोड्याच्या पाठीवर, टेकडीवर, झाडावर चढण्याने, धनुष्य ओढणे, व्यायाम करणे, गतिवान वाहनात बसणे, कुस्ती खेळणे, पायी प्रवास, लंघन, पाण्यात बुडी मारणे अथवा पोहणे, जांभई, ढेकर, खोकला, शिंक, थुंकणे, हासणे, प्राणायाम, वात, मूत्र, मल आणि शुक्र याचे प्रवर्तन होत असता जेथे क्षोभ, वेदना वगैरेचा भास होईल तेथे शल्य आहेसे समजावे. एकूण जेथे जेथे टोचणी, वेदना, बाधिर्य, जडत्व ही लक्षणे होतात; आवळल्यासारखे, सुजल्या



सारखे वाटते, पीडा होते, ज्या भागाला रोगी धक्का लागू नये म्हणून सांभाळतो, तेथे बहुधा चोळून पाहिले असता शल्य आहेसे आढळते. **शल्य निघून गेल्याचे लक्षण**—पीडा अगदी थोडी किंवा मुळीच नसणे, कोणतेही उपद्रव नसणे, तो व्रणाचा भाग स्वच्छ, कडांच्या बाजूने मऊ, घट्टपणा कमी झालेला, उंचपणा कमी होतो. शिवाय सळईने व्रणाच्या आजू बाजू तपासून व त्या भागाला आखूड, लांब करणे इ० हालचाल करून शल्य निघून गेल्याची खात्री करून घेता येते. **कारण-परत्वे अंतर्गत शल्याची होणारी स्थिती—** हाडाचा तुकडा शिरला असल्यास त्याचा चुरा होऊन आंतच विरतो, शिंगाचे किंवा लोखंडाचे शल्य असेल तर ते वाकडे होते; वृक्ष, गवत, वेळू इ० चे शल्य वेळीच न काढले तर ते रक्तमांसाला पिकवते, पू उत्पन्न करते; सोने, चांदी इ० धातूंचे शल्य पित्तातील उष्णतेमुळे दीर्घकाळाने त्या स्थानात वितळते. दुसरी स्वभावाने शीत व मृदु असलेली शल्ये पातळ होऊन शारीर धातूशी एकरूप होतात. शिंग, दात, केस, हाड, वेळू, लाकूड, दगड व माती ही शल्ये शरिरात विलीन होत नाहीत.

**वनस्पति० बिल्वः** ( रा. ११.१३४ ) बेल.

**बिलेशयप्राणि० शल्लकः** ( रा. १७.१ ) बिळात राहाणारा प्राणी. साळई.

**–कैडर्य**–पु., **वनस्पति० मदनः** ( रा. ८.२३० ) गेळफळ.

**–गर्भ**–वि., **आभ्यन्तरशल्यः (व्रणः)** ( सुचि. १.४१ ) ज्यामध्ये शल्य आहे असा ( व्रण ).

**–ज्ञान**–न., **शल्याङ्गम्, शल्यतन्त्रम्** ( सुशा. ५.४६ ) शल्यशास्त्राचे ज्ञान. शल्य शास्त्राचे अंग. शल्यशास्त्र.

**–दा**–स्त्री., **वनस्पति० मेदा** ( रा. ५.१६१ ) अष्टवर्गापैकी एक.

**–निर्घातनी**–वि., **शल्यहारिणी** (अहृसू. २५.१५-१६) शल्य हरण करणारी.

**–निर्घातनी नाडी**–स्त्री., **यन्त्र० शल्यहारिणी नाडी** ( असंसू. ३४ ) शल्य काढण्यासाठी उपयोगात आणण्याची नाडी, नळी, सळई.

**–पर्णिका**–स्त्री., **वनस्पति० मेदा** ( ध. १.१२७ ) अष्टवर्गापैकी एक.

**–पर्णी**–स्त्री., वनस्पति० मेदा ( ध. १.१२७ )
अष्टवर्गापैकी एक.

**–फल**–न., वनस्पति० मदनः ( र. १९.३९-४१ )
गेळफळ.

**–वारङ्ग**–न., शक्त्यादिशल्यमुष्टिः ( सुसू. २७.१४ )
शक्ति वगैरे जातीच्या शल्याची मूठ.

**–हर्तृ**–पु., शल्यमाहरतीति शल्यनिर्हर्ता, शल्याहरण-कर्ता ( चशा. ८.३१ )
शल्य बाहेर काढणारा.

**शल्यक**–पु., बिलेशयप्राणि० वज्रशकलो बृहद्गोधानुकारी 'साला' इति लोके (डल्हणः), तस्य गुणाः–स्वादुः शीतः पित्तघ्नो लघुः विषापहश्च (सुसू. ४६.७८,८२)
साळई. बिळात राहणारा प्राणी. साळुभेद. मोठ्या घोरपडीप्रमाणे असणारा 'साला' नावाचा प्राणी. **मांसाचे गुण**—गोड, थंड, पित्तशामक, हलका, विषनाशक.

वनस्पति० मदनः ( ध. १.१६८ ) गेळफळ.

**–रोमन्**–न., शल्लकीति ख्यातस्य प्राणिनो रोमाणि, अस्यान्तर्धूमदग्धं भस्म हिक्काशमनार्थं क्षौद्रोपेतं लेहयेत् ( सुउ. ५०.२० )
साळइ प्राण्याची पिसे ( केस ). या पिसांचे अंतर्धूम भस्म उचकीशामक म्हणून देतात. मधाबरोबर चाटवावे.

**–वसा**–स्त्री., भैषज्य० इयं नेत्ररोगेष्वञ्जनार्थं प्रयुज्यते ( असंउ. १६ )
शल्लकी–साळई प्राण्याची वसा. नेत्ररोगामध्ये अंजनासाठी उपयोगी.

**शल्लक**–पु., बिलेशयप्राणि० शल्लः महाशल्लकः, शल्ली ( चक्र. ) तन्मांसगुणाः–मधुराम्लं विपाके कटुकं, त्रिदोषघ्नं, शोथकासश्वासहरं च ( चसू. २७.७१ ) वातश्लेष्मात्मके उन्मादे शल्लकस्य मूत्रपित्तशकृल्लोमनखैश्चर्मभिः सेकाञ्जनं प्रधमनं नस्यं धूमं च कारयेत् ( चचि. ९.७४-७५; धपरि. ६.३८ ) ग्रहचिकित्सायां शल्लकस्य चर्मरोमाणि धूमार्थमुपयुज्यंते ( सुउ. ६०.३८ )
बिळामध्ये राहाणारा प्राणी. मोठी साळई. याचे मांस गोड, अम्ल, विपाकाला तिखट आहे. त्रिदोषनाशक असून सूज, खोकला, श्वास, नाहीसा करणारे आहे. वातकफात्मक उन्मादामध्ये साळईच्या मूत्र, पित्त, विष्ठा, पिसे, नखे, कातडी, यांचा उपयोग शेक, अंजन, चूर्ण फुंकून नस्य आणि धूम यासाठी करावा. भूतग्रहांच्या उपचारामध्ये कातडी व केस यांचा धुरीकरिता उपयोग करितात.

**( शल्लका )**–स्त्री., बिलेशयप्राणि० शल्लकः ( धपरि. ६.५ )
साळई.

**( शल्लकी )**–स्त्री., वनस्पति० बृहद्वृक्षः शालभेदः ( चक. १.८; सुसू. ३८.१४-१५ )
साळईवृक्ष.

**–रोमन्**–न., रोम० शल्यकरोम ( सुउ. ५०.२० )
द्र० 'शल्लक' साळईची पिसे.

**शल्लकि**–स्त्री., वनस्पति० सर्जभेदः ( चचि. २८.१६१ )
राळेचा प्रकार.

**शल्यापनयन**–न., शल्यनिर्हरणम्, शल्यं द्विविधमवबद्धमनवबद्धं च, तत्र समासेनानवबद्धशल्योद्धरणार्थं पञ्चदश हेतवः–स्वभावः, पाचनं, भेदनं, दारणं, पीडनं, प्रमार्जनं, निर्ध्मापनं, वमनं, विरेचनं, प्रक्षालनं, प्रतिमर्शः, प्रवाहणमाचूषणमयस्कान्तो हर्षश्चेति, तत्राऽश्रुक्षवथूद्गारकासमूत्रपुरीषाऽनिलैः स्वभावबलप्रवृत्तैर्नयनादिभ्यः शल्यं पतति । मांसाऽवगाढं शल्यमविदह्यमानं पाचितं सत् प्रकोथात् पूयशोणितवेगाद्गौरवाद्वा पतति । पक्वमभिद्यमानं भेदयेद्दारयेद्वा, भिन्नमनिरस्यमानं पीडनीयैः पीडयेत् पाणिभिर्वा; अणून्यक्षशल्यानि परिषेचनाध्मापनैर्बालवस्त्रपाणिभिःप्रमार्जयेत् आहारशेषश्लेष्महीनाणुशल्यानि श्वसनोत्कासनप्रधमनैर्निर्धमेत् ।अन्नशल्यानि वमनांगुलिप्रतिमर्शप्रभृतिभिः विरेचनैः पक्वाशयगतानि,व्रणदोषाशयगतानि प्रक्षालनैः,वातमूत्रपुरीषगर्भसङ्गेषु प्रवाहणमुक्तम्, मारुतोदकसविषरुधिरदुष्टस्तन्येष्वाचूषणमास्येन विषाणैर्वा; अनुलोममनवबद्धमकर्ममनल्पव्रणमुखमयस्कान्तेन; हृद्यवस्थितमनेककारणोत्पन्नं शोकशल्यं हर्षेणेति । सर्वशल्यानां द्वावेवाऽऽहरणहेतू–प्रतिलोमोऽनुलोमश्च, प्रतिलोममर्वाचीनमानयेदनुलोमं पराचीनम्।उत्तुण्डितं छित्त्वा निर्घातयेच्छेदनीयमुखम्; छेदनीयमुखान्यपि कुक्षिवक्षःकक्षावंक्षणपर्शुकान्तरपतितानि च हस्तशक्यं यथामार्गेण हस्तेनैवापहर्तुं प्रयतेत । हस्तेनैवापहर्तुमशक्यं विशस्य शस्त्रेण यन्त्रेणापहरेत् । मूर्च्छन्तमेनं शीतलेन जलेनाऽवसेचयेत् । मर्माणि संरक्ष्य मुहुराश्वासयेत् । ततः शल्यमुद्धृत्य निर्लोहितं व्रणं कृत्वा स्वेदार्हमग्निघृतप्रभृतिभिः संस्वेद्यावदह्य

प्रदिह्य सर्पिर्मधुभ्यां बद्ध्वाऽऽचारिकमुपदिशेत्। हृदयमभितो वर्तमानं शल्यं शीतजलादिभिरुद्वेजितस्याऽपहरेद्यथामार्गम्; दुरुपहरमन्यतोऽपबाध्यमानं पाटयित्वोद्धरेत्। अस्थिविवरप्रविष्टमस्थिविदष्टं वाऽवगृह्य पादाभ्यां यन्त्रेणापहरेत्, अशक्यमेवं वा बलवद्भिः सुपरिगृहीतस्य यन्त्रेण ग्राहयित्वा शल्यवारङ्गं प्रविभुज्य धनुर्गुणैर्बद्ध्वैकतश्चास्य पञ्चाङ्ग्यामुपसंयतस्याश्वस्य वक्त्रकविके बध्नीयात्, अथैनं कशया ताडयेद्यथोन्नामयन् शिरो वेगेन शल्यमुद्धरति; दृढां वा वृक्षशाखामवनम्य तस्यां पूर्ववद् बद्ध्वा उद्धरेत्। अदेशोत्तुण्डितमष्ठीलाऽश्ममुद्गराणामन्यतमस्य प्रहारेण यथामार्गमेव यन्त्रेण विचाल्यापहरेत्। विमृदितकर्णीनि कर्णवन्त्यनाबाधकरदेशोत्तुण्डितानि पुरस्तादेवाकर्षयेत्। जातुषे कण्ठासक्ते कण्ठे नाडीं प्रवेश्याग्नितप्तां च शलाकां, तयाऽवगृह्य शीताभिरद्भिः परिषिच्य स्थिरीभूतं शल्यमुद्धरेत्। अजातुषं तु जतुमधूच्छिष्टप्रलिप्तया शलाकया पूर्वकल्पेनेत्येके। अस्थिशल्यमन्यद्वा तिर्यक्कण्ठासक्तमवेक्ष्य केशोण्डुकं दृढैकदीर्घसूत्रबद्धं द्रवभक्तोपहितं पाययेदाकण्ठात् पूर्णकोष्ठं च वामयेत्, वमतश्च शल्यैकदेशसक्तं ज्ञात्वा सूत्रं सहसा त्वाक्षिपेत्; मृदुना वा दन्तधावनकूर्चकेनाऽपहरेत् प्रणुदेद्वाऽन्तः। क्षतकण्ठाय च मधुसर्पिषी लेढुं प्रयच्छेत्त्रिफलाचूर्णं वा मधुशर्कराविमिश्रम्। उदकपूर्णोदरमवाक्शिरसमवपीडयेद्धुनीयाद्वामयेद्वा भस्मराशौ वा निखनेदामुखात्। ग्रासशल्ये तु कण्ठाऽऽसक्ते निःशङ्कमनवबुद्धं स्कन्धे मुष्टिनाऽभिहन्यात् स्नेहं मद्यं पानीयं वा पाययेत्। बाहुरज्जुलतापाशैः कण्ठपीडनाद्वायुः प्रकुपितः श्लेष्माणं कोपयित्वा स्रोतो निरुणद्धि, लालास्रावं फेनाऽऽगमनं संज्ञानाशं चाऽऽपादयति; तमभ्यज्य संस्वेद्य शिरोविरेचनं तस्मै तीक्ष्णं विदध्याद्रसं च वातघ्नं दद्यात्। अनाहृतं शल्यं शोथपाकौ उग्रा रुजो वैकल्यं मरणं चापि कुर्यात्। बुद्धिमान् वैद्यो निपुणया मत्या शल्यं यत्नाद्विनिर्हरेत्।

(सुसू. २७.१-२६)

शल्य बाहेर काढणे. शल्य दोन प्रकारचे असते. एक शारीर घटकाशी संलग्न व दुसरे सुटे असलेले. यांनाच क्रमशः अवबद्ध आणि अनवबद्ध अशी नावे आहेत.

त्यापैकी सुटे असलेले शल्य पंधरा प्रकारांनी बाहेर काढले जाते. (१) आपोआप निघणारे (२) पिकून निघणारे (३) फोडून काढावयाचे (४) फाडून काढावयाचे (५) दाबून काढावयाचे (६) झाडून पुसून काढावयाचे (७) फुंकून काढावयाचे (८) ओकारीने काढावयाचे (९) विरेचनाने काढावयाचे (१०) धुवून काढावयाचे (११) बोटांनी घासून काढावयाचे (१२) कुंथण्याचा प्रयत्न करून (१३) तोंडाने किंवा शिंग, तुंबडी इ० लावून चोखून (१४) लोहचुंबकाने ओढून काढावयाचे (१५) मनाला आनंद देऊन नाहीसे करावयाचे. **स्पष्टीकरण**—(१) अश्रु, शिंक, ढेकर, खोकला, मूत्र, पुरीष, वायु यांचा वेग यांनी डोळे, डोके, आंत्र वगैरेमधले शल्य पडते (२) मांसात रुतलेले शल्य जर पिकत नसेल तर पिकवून रक्त पुवाच्या बरोबर किंवा जड असल्यामुळे पडते (३।४) पिकलेले आपोआप फुटत नसेल तर शस्त्राने फोडून वा फाडून निघते.(५)फुटूनही न निघणारे शल्य हाताने वा अन्य साधनांनी दाबून काढता येते. (६) डोळ्यातील सूक्ष्म कण वगैरे शल्य पाण्याची धार धरून, तोंडाने फुंकून किंवा मऊ केसांची कुंचली, मऊ वस्त्र किंवा अंगुलीने पुसून काढता येते. (७) अन्नाचा कण, कफ अथवा अन्य बारीक शल्य जोराचा श्वास घेऊन, जोराने खोकून किंवा फुंकून काढता येते (८) अन्नशल्य घशात बोटे घालून किंवा वांती करवून काढता येते (९) पक्वाशयातील शल्य विरेचनाने काढता येते. (१०) व्रणातील पू अथवा अन्य शल्ये धुवून काढता येतात. (१२) वायु, मूत्र, मल, आणि गर्भ ही शल्ये कुंथून काढावी. (१३) वायु, पाणी, विषारी रक्त व स्तनातील दूषित दूध तोंडाने किंवा शिंग, तुंबडीच्या साह्याने चोखून काढता येते. (१४) मोठ्या व्रणातील लोखंडी शल्य लोहचुंबकाने काढता येते. (१५) शोकादीमुळे हृदयातील शल्य मनाला आनंद देऊन दूर करता येते सर्व शल्ये काढण्याचे अनुलोम व प्रतिलोम असे दोनच हेतु संभवतात. प्रतिलोम शल्य हे शिरलेल्या मार्गानेच बाहेर काढता येते म्हणून तसे ते काढावे. व अनुलोम शल्य त्याच्या टोकाच्या पुढच्या बाजूने काढावे लागते म्हणून ते तसे काढावे.

ज्याचे तोंड दुसऱ्या बाजूला थोडे बाहेर आले आहे अशा उत्तुंडित शल्याच्या व्रणाचा भाग कापावा ज्या भागात शल्याचा काटा आहे तो पुढील भाग कापावा. नंतर ते शल्य हाताने किंवा हातोडीने हालवावे व ते पुढील बाजूनेच काढावे. ज्या शल्याचे टोक कापावे लागेल असे कूस उरःस्थान, काख, जांघ, फासळ्यांचा मधला भाग यांतील शल्य हाताने काढण्यासारखे असल्यास हातानेच योग्य मार्गाने काढावे. हाताने अशक्य असल्यास शस्त्राने यंत्र जाण्यापुरती जागा कापून यंत्राने काढावे. मूर्च्छा आली तर थंड पाणी शिंपडावे, मर्माचे रक्षण करावे व आश्वासन-धीर द्यावा. **शल्य काढल्या-नंतर—** व्रणातील रक्त पुसून शेकणे जरूर असल्यास अग्नी तूप इ० नी अवस्थेनुसार शेकून, चटका देऊन, तूप आणि मध व्रणाला चोपडून बंध बांधून पथ्याने वागण्यास सांगावे. हृदयाच्या सभोवार असलेले शल्य काढण्यापूर्वी थंड पाणी व इतर द्रव्यांनी त्रस्त करून योग्य मार्गाने ते काढावे. काढण्यास कठीण व दुसऱ्या बाजूने अडलेले चिरून काढावे. हाडात किंवा त्याच्या पोकळीत घुसलेले पायाने पकडून यंत्राने उपटून काढावे. असे काढणे अशक्य असेल तर बळवान माणसांनी रोग्याला दाबून धरून शल्याचे मागचे टोक पकडून वाकवून धनुष्याच्या दोरीने बांधून, पंचांगी नावाच्या बंधाने घोड्याला व्यवस्थित बांधून, त्याच्या लगा-माला ते धनुष्य बांधावे, नंतर त्या घोड्याला चाब-काने मारावे, म्हणजे तो उधळून त्याच्या डोक्याच्या झटक्याने शल्य बाहेर ओढले जाईल किंवा झाडाची शाखा वाकवून तिला वर लिहिल्याप्रमाणेच धनुष्य बांधावे व मग ती सोडावी म्हणजे ती वर जाईल व शल्य त्या झटक्याने निघेल. कूस इत्यादी शस्त्राने छेद घेता येत नाही अशा भागांतील शल्य गोळा, दगड, मोगरी यापैकी एकाने आघात करून यंत्राने हालवून काढावे. याच भागात जर कान असलेले शल्य असेल तर कान वळवून पुढूनच ओढून काढावे. घशात लाखेचे शल्य अडकले असेल तर पोकळ नळी घशात घालून तिच्या मधून अग्नीने तापलेली सळई शल्यापर्यंत आत घालून ते शल्य सळईला चिकटलेले आहे असे पाहून थंड पाणी सळईवर शिंपडून शल्याला सळई पक्की चिकटली आहे असे पाहून ते बाहेर काढावे. इतर शल्य असेल तर लाख किंवा मेण यांनी लपेटलेल्या सळईने वरीलप्रमाणेच शल्य काढावे. हाड किंवा इतर शल्य कंठामध्ये तिरके असेल तर द्रवान्नाबरोबर केसांचा चेंडू ( तो बळ-कट लांब दोऱ्याने बांधून दोऱ्याचे एक टोक हातात धरून ) पाजावा, ओ येईपर्यंत पाजून वांती करवावी. वांती होत असताना दोरा एकदम बाहेर ओढावा किंवा दंत धावनाच्या बाहेर येत नसेल तर मऊ कुंचलीने काढावे किंवा आत ढकलावे. घशाला जखम असेल तर मध, तूप किंवा त्रिफळा, मध, साखर मिश्र करून चाटावे. पाण्यात बुडल्याने पोटात खूप पाणी गेले असेल तर त्याला उलटे करून फिरवावे, पोट दाबावे, व ओकवावे किंवा भस्माच्या राशीत तोंडापर्यंत पुरावे. घशात घास अडकला तर त्याला शंका किंवा जाणीव होऊ न देता मानेवर मुठीने दणका द्यावा, किंवा स्नेह, मद्य किंवा पेय पाजावे. हात, दोरी, वेल, फास यांनी गळा दाबल्याने वात प्रकुपित होऊन कफाला दुष्ट करून स्रोतसाचा रोध करतो तेव्हा लाळ गळते, फेस येतो व मूर्च्छा येते. त्याला अभ्यंग करून शेकून डोक्यातून कफ-स्राव करणारे रेचक आणि वातनाशक मांस रस द्यावा. जर शल्य निघाले नाही तर, सूज तीव्र वेदना, विकलता, विकृणे व मरण सुद्धा येते म्हणून बुद्धिमान वैद्याने कुशलतेने वरील उपचारांनी शल्य काढावे.

**शल्यापनयनीय**-वि., अध्यायसंज्ञा० ( सुसू. २७.१ ) या नावाचा अध्याय. यात शल्य कसे काढावे हे सांगितले आहे.

**शल्यापहर्तृक**-न., आयुर्वेदाङ्ग० शल्यतन्त्रम् ( चसू. ३०.२८ ) आयुर्वेदाचे एक अंग. शल्यतंत्र, शल्यशास्त्र.

**शल्याहरण**-न., शल्यनिर्हरणम् ( असंसू. ३७.१ ) शल्य काढणे.

**शल्याहरणविधि**-पु., शल्यनिर्हरणविधिः ( अहसू. २८.१ ) शल्य काढण्याचा विधी-रीती.

**शव**-पु. न., मृतप्राणिशरीरम् (सुसू. ४५.९-१०) प्रेत.

**-कोथ**-पु., प्रेतस्य कुथितम्, कुथितत्वम् ( असंउ. ७.२५७-८ ) प्रेत कुजणे.

**–विष**–वि., **शवे विषं यस्य सः शवविषः (कीटादिदेहः)** ( सुक. ३.५ )
शवामध्ये म्हणजे प्रेतामध्ये निर्माण होणारे किंवा झालेले विष. प्रेतविष.

**शश**–पु., **बिलेशयजाङ्गलमृग॰ वातप्रकृतिप्राणिविशेषः** ( सुशा. ४.६७ ) **तन्मांसगुणाः–स्वादु, कषायं कटुपाकि, शीतं, लघु, रूक्षं, विशदमल्पमारुत-सन्निपाते शस्तं, पित्तकफापहम्** ( चसू. २७.७६; सुसू. ४६.८० ) **तन्मांसरसो वास्तुकयुक्तो विबन्धेन युक्ते रक्तपित्ते उपयुक्तः** ( चचि. ४.४९ ) **तस्य पित्तं शिरःकपालं च नेत्ररोगेषूपयुज्यते** (असंउ. १६.२०; धपरि. ६.५)
हिं.—खरगोश, खरहा.
**म.—ससा.**
बं.—खरगोश.
ससा. बिळात राहाणारा, पाणी कमी असणाऱ्या प्रदेशातील प्राणी. याचे मांस– गोड, तुरट, पचल्या-नंतर तिखट, थंड, हलके, रूक्ष, चिकटा नाशक, थोडा वात असलेल्या सन्निपातामध्ये योग्य. पित्तकफ नाशक. त्याचा मांसरस– चाकवत (चुका) युक्त– विबंधयुक्त रक्तपित्तावर उपयोगी आहे. त्याचे पित्त व डोक्याची कवटी नेत्ररोगावर उपयोगी.

**–घातक**–पु., **प्रसहप्राणि॰** ( ध. परि. ६.१४ )
द्र॰ ' प्रसह ' शिकारी प्राण्यामधील एक.

**–घातिन्**–पु., **प्रसहपक्षि॰चिल्ल्याकारो महाचरणनखः प्रहारेण शशकाऽऽहरणशीलः, शशाघ्निरिति लोके प्रसिद्धः, अन्ये पाजीत्याहुः** ( ड. सुसू. ४६.७४ )
प्रसह प्राण्यांमधील एक पक्षी.
घारीच्या आकाराचा मोठे पाय व नखांचा सशावर झडप घालून पकडणारा पक्षी. याला शशाघ्नि आणि पाजी अशीही नावे आहेत. बहिरी ससाणा.

**–घातिमुख**–न., **स्वस्तिकयन्त्रशरारीमुखसदृशं यन्त्रम्** ( सुसू. ७.१० ) द्र॰ **'स्वस्तिकयंत्र'**
स्वस्तिकयंत्रातील एक प्रकार. आटी पक्ष्याच्या चोचीच्या आकाराचे तोंड असलेले.

**–घृत**–न., **शशमांसघृत॰ इदमूर्ध्वजत्रुगदापहम्** ( चचि. २६.१७५ )
सशाचे मांस व जीवन्ती इत्यादी औषधांनी सिद्ध केलेले तूप हे गळयाच्या वरील भागात होणाऱ्या रोगाना उपयुक्त.

**–घ्नी**–स्त्री., **प्रसहपक्षि॰ पाञ्जिरिति ख्यातः, शशं हन्तीति** ( चसू. २७.३६ )
हिं.—शिकरा.
**म.—बहिरी ससाणा.**
बं.—पाञ्जी.
बहिरी ससाणा. शिकारी पक्षी. सशाला मारणारा.

**–शिम्बिका**–स्त्री., **वनस्पति॰ जीवन्ती** (रा. ३.१७८)
हरीणदोडी.

**–शोणित**–न., **शशरक्तम्** ( असंसू. ३६.६ )
सशाचे रक्त.

**शशाङ्क**–पु., **निर्यास॰ चन्द्रपर्यायत्वेन कर्पूरः** ( रा. १२.५६ )
कापूर.

**शशाङ्ककिरण**–पु., **कृतान्न॰ कर्पूरनाडिका** ( अहसू. ३.३२ )
शेवया.

**शशाण्डुली**–स्त्री., **वनस्पति॰ कोमलेयं तिक्तकटुः, जरठा सती कट्वम्लयुक्ता कफ वहा च पाके तु अम्ला मधुरा विदाहकृच्च; सेयं शुष्का रोचनी दीपनी च** ( रापरि. ७.१०३ )
एक प्रकारची काकडी. मेका: ही लहान व कोमल, कडू व तिखट, जुनी झाल्यावर आंबट व तिखट, पचल्यानंतर आंबट, विदाहकारक, सुकल्यावर रुचकर आणि दीपक.

**शशासृज्**–न., **शशरुधिरम्** (सुशा.२.१७) सशाचे रक्त.

**शशिन्**–पु., **वनस्पति॰ उशीरम्** ( रा. १०.६९ ) वाळा.
**निर्यास॰ कर्पूरः** ( ध. ३.३१ ) कापूर.

**(शशि)–कान्त**–न., **वनस्पति॰ कुमुदम्** (रा.१०.२४६)
कमळ.

**–प्रिय**–न., **रत्न॰ मौक्तिकम्** (रा. १३.६७) मोती.

**–मित**–वि., **एकभागम्, शशिनः चन्द्रपर्यायत्वेन एकत्वसंख्याकत्वमापद्यते** ( र. १७.१३८ )
एक या अर्थाचा सांकेतिक शब्द.

**–राजी**–स्त्री., **वनस्पति॰ बाकुची** ( र. २५.१०६ )
बाकुची, बावची.

**–लता**–स्त्री., **सोमवल्ली** (र. ११.९०-९२) सोमवल्ली.

**–लेखा**–स्त्री., **वनस्पति॰ बाकुची** ( ध. १.१६६ )
बावची.

**–वाटिका**–स्त्री., **वनस्पति॰ पुनर्नवा** ( ध. १.२७४ )
पुनर्नवा.

**शश्वत्**-( अव्य० ) प्रतिदिनम् नित्यम्, निरन्तरम् ( सुनि. १४.६ )

नित्याचे, कायमचे.

**शष्कुलिका**-स्त्री., कृतान्न० शष्कुली ( सुचि. १०.५ ) करंजी.

**शष्कुली**-स्त्री., आहारद्रव्य० शालिपिष्टैः सगुडतिलैस्तैलपक्वाः शष्कुल्यः क्रियन्ते। 'शाङ्कुलि' इति लोके ( ड. ) श्लेष्मपित्तजननानां श्रेष्ठाऽसौ ( चसू. २५.४०; सुसू. ४६.४०० )

करंजी. तांदळाच्या पिठाच्या पुरीमध्ये गुळाच्या सह तिळाचे सारण घालून तेलात तळलेला पदार्थ. हा कफपित्तकारक पदार्थात श्रेष्ठ.

शारीर० शष्कुल्याऽऽकारो बाह्यकर्णस्य विभागः ( सुचि. २५.११ )

कानाची पाळी. करंजीच्या आकाराचा कानाचा बाह्य विभाग.

**-कल्प**-पु., सूदशास्त्रोक्तशष्कुलीनिर्माणविधिः ( चक. १.२४ )

पाकशास्त्रोक्त करंजी करण्याचा विधी-पद्धती-रीती.

**शष्प**-न., वनस्पति० नीलदूर्वा, द्र० 'दूर्वा' (ध.४.१४३) निळी दूर्वा.

बालतृणम् ( सुसू. ६.३२ ) कोवळे गवत.

**शस्तभूमिज**-वि., प्रशस्तभूम्यां जातम् ( सुचि. २४.५ ) सुयोग्य जमीनीत झालेले.

**शस्त्र**-न., छेदनादिषूपयुक्तं लोहादिकृतं वस्तु ( सुसू. ८.१४ ) तत्संख्या- विंशतिः शस्त्राणि- मण्डलाग्रकरपत्रवृद्धिपत्रनखशस्त्रमुद्रिकोत्पलपत्रकार्धधारसूचीकुशपत्राटीमुखशरारिमुखान्तर्मुखत्रिकूर्चककुठारिकाव्रीहिमुखारावेतसपत्रकबडिशदन्तशंक्वेषण्यः; शस्त्राणां कर्माणि-मण्डलाग्रकरपत्रे स्यातां छेदने लेखने च, वृद्धिपत्रनखशस्त्रमुद्रिकोत्पलपत्रकार्धधाराणि छेदने भेदने च, सूचीकुशपत्राटीमुखशरारिमुखान्तर्मुखत्रिकूर्चकानि विस्रावणे, कुठारिकाव्रीहिमुखाऽऽरावेतसपत्रकाणि व्यधने सूची च, बडिशं दन्तशङ्कुश्चाहरणे, एषण्येषणे आनुलोम्ये च, सूच्यः सीवने; इत्यष्टविधे कर्मण्युपयोगः शस्त्राणां व्याख्यातः। शस्त्रधारणविधिः-तत्र वृद्धिपत्रं वृन्तफलसाधारणे भागे गृह्णीयाच्छेदनान्येवं सर्वाणि, वृद्धिपत्रं मण्डलाग्रं च किञ्चिदुत्तानेन पाणिना लेखने बहुशोऽवचार्यम् वृन्ताग्रे विस्रावणानि, विशेषेण तु बालवृद्धसुकुमारभीरुनारीणां राज्ञां राजपुत्राणां च त्रिकूर्चकेन विस्रावयेत्, तलप्रच्छादितवृन्तमङ्गुष्ठप्रदेशिनीभ्यां व्रीहिमुखं, कुठारिकां वामहस्तन्यस्तामितरहस्तमध्यमाङ्गुल्याऽङ्गुष्ठविष्टब्धयाऽभिहन्यात् आराकरपत्रैषण्यो मूले, शेषाणि तु यथायोगं गृह्णीयात्। तेषां नामभिरेवाऽऽकृतयः प्रायेण व्याख्याताः; तत्र नखशस्त्रैषण्यावष्टाङ्गुले, सूच्यो द्व्यङ्गुलत्र्यङ्गुला वा ( ड. ) प्रदेशिन्यग्रपर्वप्रदेशप्रमाणा मुद्रिका; दशाङ्गुला शरारिमुखी, सा च कर्तरीति कथ्यते। शेषाणि तु षडङ्गुलानि, शस्त्रगुणाः-तानि सुग्रहाणि, सुलोहानि, सुधाराणि, सुरूपाणि, सुसमाहितमुखाग्राणि; अकरालानि, चेति शस्त्रसंपत्। शस्त्रदोषाः-तत्र वक्रं, कुण्ठं, खण्डं, खरधारमतिस्थूलमतितुच्छमतिदीर्घमतिह्रस्वमित्यष्टौ शस्त्रदोषाः अतो विपरीतगुणमाददीत अन्यत्र करपत्रात्। तद्धि खरधारमस्थिच्छेदनार्थम् तत्र धारा भेदनानां मासूरी लेखनानामर्धमासूरी, व्यधनानां विस्रावणानां च कैशिकी छेदनानामर्धकैशिकीति। बडिशं दन्तशङ्कुश्चाऽऽनताग्रे, तीक्ष्णकण्टकप्रथमयवपत्रमुख्येषणी गण्डूपदाकारमुखी च तेषां पायना त्रिविधा क्षारोदकतैलेषु तत्र क्षारपायितं शरशल्याऽस्थिच्छेदनेषु उदकपायितं मांसच्छेदनभेदनपाटनेषु तैलपायितं सिराव्यधनस्नायुच्छेदनेषु। तेषां निशानार्थं श्लक्ष्णशिला माषवर्णा धारासंस्थापनार्थं शाल्मलीफलकम् ( सुसू. ८.३-१३ ) अनुशस्त्राणि-त्वक्सारस्फटिककाचकुरुविन्दजलौकोऽग्निक्षारनखगोजीशेफालिकाशाकपत्रकरीरबालाङ्गुलयः शिशूनां शस्त्रभीरूणां च शस्त्राऽऽभावे बुद्धिमान्वैद्यः छेद्ये भेद्ये च त्वक्सारादिचतुर्वर्गं योजयेत्। शक्येष्वाहार्यच्छेद्यभेद्येषु नखं योजयेत्। ये नेत्रवर्त्मगता मुखगताश्च रोगास्तान् गोजीशेफालिकाशाकपत्रैर्विस्रावयेत्। एषण्यलाभे एष्येषु तु बालाङ्गुल्यङ्कुराहिताः ( सुसू. ८.१५-१९ )

शस्त्र. हत्यार. छेदनादि क्रियेमध्ये जे उपयोगी पडते ते हत्यार होय. त्यांची संख्या वीस आहे. (१) मंडलाग्र (२) करपत्र (३) वृद्धिपत्र (४) नखशस्त्र (५) मुद्रिका (६) उत्पलपत्र (७) अर्धधार (८) सूची (९) कुशपत्र (१०) आटीमुख (११) शरीरमुख (१२)

अंतर्मुख (१३) त्रिकूर्चक (१४) कुठारिका (१५) व्रीहिमुख (१६) आरा (१७) वेतसपत्र (१८) बडिश (१९) दंतशंकु (२०) एषणी.

**शस्त्राचे उपयोग**—मंडलाग्र आणि करपात्र या शस्त्रांचा उपयोग छेद घेणे व खरडणे या कर्मासाठी वृद्धिपत्र, नखशस्त्र, मुद्रिका, उत्पलपत्र, अर्धधार ही छेद घेणे व फोडणे या कर्मासाठी. सूची, कुशपत्र, आटीमुख, शरारीमुख, अंतर्मुख, त्रिकूर्चक ही विस्रावणासाठी. कुठारिका, व्रीहिमुख, आरा, वेतसपत्र, ही भोक पाडण्यास आणि विंधनासाठी. बडिश, दंतशंकु ही ओढून काढण्यासाठी. एषणी व्रणमार्ग शोधणे व स्राव होण्यासाठी; आणि सूची शिवण्यासाठी. या आठ प्रकारच्या कामासाठी यांचा उपयोग होतो.

**शस्त्रधारण विधी**—वृद्धिपत्राला मूठ आणि पाते यांचा ज्या ठिकाणी सांधा असतो त्या ठिकाणी धरावे. याप्रमाणे भेदनाकरिता जी शस्त्रे घ्यावयाची त्यांचा उपयोग करावा. वृद्धिपत्र आणि मंडलाग्र यांचा वापर करताना हात किंचित उंच करून खरडण्यासाठी वापर करावा. रक्तस्रावासाठी जे शस्त्र वापरावयाचे त्याची मूठ हाती धरून वापर करावा. बाल, वृद्ध, सुकुमार, भित्रे, स्त्रिया, राजे, राजपुत्र यांचा रक्तस्राव त्रिकूर्चकाने करावा. व्रीहिमुख शस्त्र अंगठा आणि प्रदेशिनी यांनी पकडावे. तळहातात त्याची मूठ येईल असे धरावे. याप्रमाणेच कुठारिका डाव्या हातात ठेवून उजव्या हाताचा अंगठा व मधले बोट यांनी धरून आघात करावा. आरा, करपत्र, एषणी यांना मुळाला धरून व इतरांचा यथास्थान, यथायोग्य धरून उपयोग करवा. त्यांच्या नावाप्रमाणेच आकृत्या सांगितल्या आहेत.

त्यामध्ये नखशस्त्र, एषणी आठ अंगुळे लांबीची, सूची दोन किंवा तीन अंगुळे लांबीची, मुद्रिका दुसऱ्या बोटाच्या शेवटच्या पेऱ्याच्या घेराएवढा घेर असलेली असावी. शरारीमुख दहा अंगुळे लांब. हिलाच कातरी म्हणतात. नखशस्त्र, एषणी, सूची ही सोडून बाकीची सर्व सहा अंगुळे लांब असावीत. शस्त्राचे गुण— जे धरावयास उत्तम, चांगल्या धातूचे बनविले आहे, ज्याला धार चांगली आहे, जे दिसावयास चांगले आहे, ज्याच्या तोंडाची टोके व्यवस्थित आहेत, पात्याला धार असून खडखडीत खड्डे नाहीत असे शस्त्र उत्तम.

शस्त्राचे दोष— वाकडे, धार नसलेले, खड्डे पडलेले धार असलेले, खडबडीत, अति जाड, अति बारीक, अति लांब, अति आखुड, हे आठ शस्त्रदोष आहेत. या दोषांच्या विपरीत गुणांचे शस्त्र घ्यावे. मात्र करवतीला दातेच असणे जरूर आहे. म्हणून तेवढा अपवाद करावा. ती खरखरीत धारेची, हाड कापण्याकरिता उपयुक्त.

शस्त्राची धार— भेदन कार्यासाठी मसुरीच्या डाळीच्या धारेसारखी ( जाडी इतकी ) जाडीची धार असावी. व्यधनासाठी आणि विस्रावणासाठी केसाइतकी बारीक धार असावी. छेदनासाठी अर्ध्या केसाइतकी बारीक धार असावी. बडिश आणि दंतशंकु यांची टोके थोडीशी पुढे वळलेली असावीत. सळई— तीक्ष्ण काटा, उगवलेल्या जवाचे पहिले पान व गांडूळ अशा तीन प्रकारच्या आकाराच्या असाव्यात. शस्त्रांना तीन द्रव्यांनी पाणी देतात. ती द्रव्ये क्षार, पाणी व तेल ही होत. क्षाराचे पाणी दिलेले शस्त्र बाणाचे शल्य काढण्यास व हाडाचा छेद घेण्यास— कापण्यास उपयुक्त. पाण्याचे पाणी दिलेले मांस छिन्न भिन्न करणे व चिरणे या करिता उपयुक्त. तेलाचे पाणी शस्त्र शिरांना भोक पाडण्यास व स्नायूचा छेद घेण्यास उपयुक्त. शस्त्राला धार लावण्यासाठी उडदी रंगाचा गुळगुळीत दगड उपयुक्त होतो. धार जशीच्या तशी तीक्ष्ण राहावी म्हणून सावरीच्या फळांचा उपयोग करावा.

**अनुशस्त्रे**—मुले व शस्त्राची ज्यांना भीती वाटते त्यांच्यासाठी अनुशस्त्रांचा उपयोग करावा. बांबूचा कोंब, स्फटिक, काच, कुरुविंद, जळवा, अग्नि, क्षार, नख, गोजिव्हा, खोरेती, सागाची पाने, नेवती, केस, बोटे ही अनुशस्त्रे होत. बालक आणि भित्र्या लोकांच्या बाबतीत छेदना व भेदनासाठी त्वक्सारादी चारांचा उपयोग करावा. ओढून काढणे, शक्य, असेल तेथे छेदन भेदनासाठी नखांचा उपयोग करावा. डोळ्यात, पापणीमध्ये असणाऱ्यात, मुखातील रोगांना गोजिव्हा वगैरेंचा उपयोग करावा. ओढून काढण्यासाठी एषणी ऐवजी केसांचा, अंगळी वगैरेंचा उपयोग करावा.

**खनिज० लोहम्** ( ध. ६.२६ ) लोहधातु.

**—कर्मन्**—न., उपक्रम० शस्त्रैर्यत् शल्याऽऽहरणादि क्रियते तद् शल्यचिकित्सा ( चसू. १.९१ ) तच्च शस्त्रकर्म–पाटनं, व्यधनं, छेदनं, लेखनं प्रच्छनं,

सीवनं चेति षड्विधम् ( चचि. २५.५५ ) छेद्यं, भेद्यं, लेख्यं वेध्यमेष्यमाहार्यं, विस्राव्यं सीव्यमित्यष्ट-विधम् ( सुसू. ५.५ )
शस्त्राने शल्य काढणे वगैरे ज्या क्रिया केल्या जातात त्या शस्त्रकर्मे होत. फाडणे, भोक पाडणे, छेद घेणे, खरडणे, फासण्या पाडणे, शिवणे. सुश्रुतमताने छेद घेणे, फोडणे, खरडणे, भोक पाडणे, सळईने शोधणे, धरून बाहेर काढणे, स्राव करणे, शिवणे ही आठ आहेत.

**–कृत्य**–वि., शस्त्रेण कर्तुं चिकित्सितुमर्हं ; (सुचि. १.९)
शस्त्राने उपचार करण्यास योग्य.

**–कोश**–पु., शस्त्रपेटी ( अहृसू. २६.३३-३४ )
शस्त्र ठेवण्याची पेटी.

**–कोशतरु**–पु., वनस्पति० महापिण्डी ( रापरि. ९.३३ )
महापिंडीतरु, पेंडिरा.

**–तैक्ष्ण्य**–न., शस्त्रस्य तीक्ष्णत्वम् ( सुसू. ५.१० )
शस्त्राचे तीक्ष्णत्व.

**–दोष**–पु., शस्त्राऽवगुणः कुण्ठखण्डत्वादिः द्र० 'शस्त्र' ( सुसू. ८.९ )
शस्त्राचे दोष. वाकडेपणा, बोथटपणा इत्यादी.

**–पद**–न., शस्त्रेण छेदं कृत्वा यत्स्थानं भवति तत्, शस्त्रस्थानम् ( सुसू. ५.७ )
शस्त्राच्या आघाताने झालेले व्रण असलेले स्थान. शस्त्र लागलेले ठिकाण.

**–पदाङ्कन**–न., अङ्कनं चिह्नम्, शस्त्रच्छेदकृतं चिह्नम् ( असंसू. ३७ )
शस्त्रच्छेदाने झालेली खूण.

**–परिहर्तव्य**–वि., (परिव०) शस्त्रेण निःसारणीयः ( सुशा. ५.१५ )
शस्त्राने नाहीसा होणारा.

**–प्रणिधान**–न., शस्त्रधारणं शस्त्रकरणं छेदनादि कर्म ( चसू. ११.५५ )
शस्त्राचे धारण, शस्त्र घेणे, शस्त्राने करावयाचे छेदन इ० कर्म.

**–भीरु**–वि., यः शस्त्राद् बिभेति सः ( सुसू. ८.१६ )
जो शस्त्राला भितो तो.

**–मार्ग**–पु., व्रणे यत्र शस्त्रं प्रयुक्तं, तत्स्थानम् ( सुउ. १६.६ )
व्रणावर जेथे शस्त्र चालविले जाते ते स्थान.

**–योजना**–न., शस्त्रस्योपयोगः ( अहृसू. २५.२ )
शस्त्राचा उपयोग.

**–विधि**–पु., उपक्रम० शस्त्रकर्म ( अहृसू. २६.१ )
शस्त्रकर्म विधि. शस्त्रक्रियेची पद्धती-रीती.

**–संनिपात**–पु., युद्धम् ( सुचि. २४.९१ )
युद्ध.

**–संपद्**–स्त्री., शस्त्रगुणाः, द्र० 'शस्त्र' (सुसू. ८.८)
शस्त्राचे गुण.

**शस्त्राङ्गा**–स्त्री., वनस्पति० क्षुद्राम्लिका ( रा. ५.४४ )
अंबोती.

**शस्त्रायस**–न., खनिज० तीक्ष्णलोहम् द्र० 'लोह' ( रा. १३.३० ) पोलाद.

**शस्त्रावचारणीय**–वि., अध्यायसंज्ञा० ( सुसू. ८.१ )
या नावाचा अध्याय. यात शस्त्रक्रियेची माहिती आहे.

**शस्त्रोचित**–वि., शस्त्रसात्म्यम्, अभ्यस्तशस्त्रपातादिः ( चचि. ३०.३१६ )
शस्त्रचिकित्सेचा अभ्यास केलेला, कुशल शस्त्र वैद्य.

**शस्य**–न., अस्थिरहितं फलम् ( चचि. १.३७ )
अस्थिरहित फळ, आठळी नसलेले फळ.
धान्यम् ( चवि. ३.७(३) धान्य.

**–जाति**–स्त्री., अन्नसमूहः, तत्र धान्यानि शूकधान्य-कुधान्यशमीधान्यानि ( सुसू. ४६.४३२ )
अन्नधान्याचा समूह. तूस असलेले, शेंगा असलेले व तृणधान्यादि हलके धान्य.

**शाक**–पु., वनस्पति० सागः ( सुसू. ३८.८-९; रापरि. ९.६ ) साग.
आहारद्रव्य० ( चसू. १३.२३ ) व्यञ्जनभेदः, शाकवर्गः ( सुसू. ४६.३५० )
भाजीचा प्रकार. चटणी, कोशिंबरीचा प्रकार.

**–चुक्रिका**–स्त्री., वनस्पति० अम्लिका ( रा. ११.३६ )
चिंच.

**–च्छदनप्रकाशा**–वि., शाकतरुपत्रसमा ( जिह्वा ) खरः ( सुनि. १६.३७ )
सागाच्या पानाप्रमाणे खरखरीत ( जीभ ).

**–जफल**–( परिव० ) न., सागफलम् ( सुचि. ७.६ )
सागाचे फल.

**–पत्र**–पु., वनस्पति० शिग्रुः ( रा. ७.६० ) शेवगा.
न., सागपत्रम्, अयमनुशस्त्रत्वेनोपयुज्यते ( सुसू. ८.१५ )

सागाचे पान. उंचवटा घासण्यासाठी अनुशस्त्र म्हणून उपयोगी.

**–पुष्प**–पु., **वनस्पति० करीरः** ( ध. ५.९९ ) नेवती.

**–फल**–न., **सागफलम्** ( सुसू. ३८.४३-४४ ) सागाचे फळ.

**–बीज**–न., **सागबीजम्** ( सुशा. १०.५९-६२ ) सागाचे बी.

**–योग्य**–पु., **वनस्पति० धान्यकम्** ( रा. ६.९८ ) कोथिंबीर. धने.

**–राज**–पु., **वनस्पति० वास्तुकम्** ( रापरि. ७.६२ ) चाकवत.

**–वर्ग**–पु., **व्यञ्जनार्थमुपयुक्तमौद्भिदं द्रव्यम्** (चसू. २७; सुसू. ४६.३३५; रा. मूलकादिवर्ग ) **मूलं, पत्रं, करीरमग्रं, फलं, काण्डमधिरूढकं त्वक्पुष्पं छत्रकञ्चेति दशविधं शाकम्; तत्र मूलशाकं मूलकगृञ्जनादिकं, पत्रशाकं वास्तुकादि, करीरं नालशाकम् मधुशिग्रुकरीरादिकम्, अग्रं कोमलाङ्कुरः वंशकरीरादिः** (चसू. २७; सुसू. ४६.२८९-२९०) **फलशाकं कूष्माण्डम् अलाब्वादि** ( सुसू. ४६.२१३-१६ ) **पुष्पमगस्तिपुष्पादिकम्, छत्रकशाकं पलालेक्षुकरीषवेणुक्षितिजादिकम्** ( सुसू. ४६.२११-२८० ) **षड्विधं शाकम्–पत्रं, पुष्पं, फलं, नालं, कन्द, संस्वेदजं च तच्च यथोत्तरं गुरु विद्यात् । प्रायः सर्वाणि शाकानि गुरूणि, रूक्षाणि, विष्टम्भीनि बहुवर्चांसि सृष्टविण्मारुतानि च सन्ति । शाकं वपुर्भिनत्ति, अस्थिरक्तशुक्रवर्णनेत्रप्रज्ञास्मृतीर्नाशयति, पलितं करोति, तथैव गतिमपि हन्ति । शाकेषु सर्वे रोगा वसन्ति । तस्माद्बुधः शाकविवर्जनं कुर्यात्** ( भाप्र पूर्वखण्ड, वर्गप्रकरण ६; शाकवर्ग ) **रसभेदेन शाकवर्गः–तिक्तप्रायो मण्डूकपर्ण्यादिशाकवर्गः** ( सुसू. ४६.२६२ ) **कषायमधुरशाकं चुञ्चूयूथिकादि** ( सुसू. ४६.२४९ ) **पिण्याकतिलकल्कादि शुष्कशाकानि सर्वदोषप्रकोपणानि शाकेषु पुष्पे, पत्रे फले, नाले, कन्दे च गुरुता क्रमादधिकतरा वर्तते । सर्वं सकषायं स्वादुशाकं विड्भेदि, गुरु, रूक्षं प्रायो दुर्जरमस्ति । कर्कशं जीर्णं, कृमिजुष्टमदेशजमकालविरोहि पत्रशाकं वर्जयेत्** ( सुसू. ४६.२९६-२९७ ) **स्विन्नं निष्पीडितं स्नेहसंस्कृतं शाकं हितम्, अस्विन्नं स्नेहरहितमपीडितं शाकमहितम्** (सुसू. ४६.३५०)



**पत्रफलपुष्पादि अशुष्कं तरुणं नवं शाकं श्रेष्ठम्** ( सुसू. ४६.३३९ ) **पुष्पपत्रादि यथोत्तरं गुरु, पत्रशाकमपेक्ष्य पुष्पशाकं गुरु, ततः फलशाकम्, ततो नालशाकं, ततोऽपि कन्दशाकमिति ज्ञेयम्** ( सुसू. ४६.२९६ ) **तत्र किञ्चित्संस्कारकं किंचिच्छाकं किंचिद्भेषजं किञ्चिदाहारयोगीति** ( सुसू. ४६.२४३ ) **तद्गुणाः– विष्टम्भि, वातलं च** ( सुसू. ४६.२४२ )

निरनिराळ्या भाजीचा वर्ग. तोंडी लावण्यासाठी उपयोगी पडणारे, जमिनीत होणारे द्रव्य. त्या औद्भिजाचे मूळ, पान, करीर (कोंब), शेंडा, फळ, कांडे, मोड, साल, फूल, छत्री, असे दहा प्रकार. **मुळांची भाजी**— मुळे, गाजरे इत्यादी. **पानांची भाजी**— चुका, चाकवत वगैरे. **करीर भाजी**—मधुर शिग्रु वगैरे. **शेंड्याची भाजी**—कोवळे अंकूर, वेळु वगैरे. **फळाची भाजी**—कोहोळा, भोपळा वगैरे. **फुलांची भाजी**— अगस्त्याची फुले वगैरे. **छत्रकाची भाजी**— कडबा, ऊस, शेणी, बांबू आणि जमिनीवर येणारे अळमे. पान, फूल, फळ, नाल, कंद आणि जमिनीतून येणारे अळभे. असे भाजीचे सहा प्रकार आहेत. बहुतकरून सर्व भाज्या जड, रूक्ष, अवष्टंभ करणाऱ्या, पुष्कळ मळ निर्माण करणाऱ्या, विष्ठा आणि अपानवायु यांचे निःसरण करणाऱ्या आहेत. भाज्या शरिराचा नाश करतात. हाडे, रक्त, शुक्र, वर्ण, डोळे, प्रज्ञा, स्मृती यांचा नाश करतात. केस लवकर पिकतात. पायाचा वेग कमी करतात. भाज्यांमध्ये सर्व रोग वास करतात म्हणून शहाण्यांनी भाज्या वर्ज्य कराव्यात.

रसाच्या भेदाने शाकवर्ग— कडू रसाच्या मंडूकपर्णी वगैरे भाज्या आहेत. कषाय आणि मधुररसाच्या भाज्या— चुंचुकादि आहेत. तिळाची पेंड, तिळाची चटणी घालून केलेल्या भाज्या, वाळलेल्या भाज्या सर्वदोषप्रकोपक आहेत. भाज्यांत फूल, पान, फळ, नाळ, कंद हे क्रमाने अधिक जड आहेत. तुरट रस थोडा असलेल्या सर्व गोड भाज्या मळ फोडणाऱ्या आहेत, जड, रूक्ष, प्रायः पचावयाला कठीण आहेत. कडक, पिकलेली, किडलेली, अयोग्य जागेत व ऋतूत झालेली पालेभाजी उपयोगात आणू नये. शिजवून, रस पिळून टाकून, स्नेहाचा ( फोडणी ) संस्कार करून

केलेली भाजी हितकर आहे. याच्या उलट अशी भाजी आरोग्यनाशक आहे. पचावयास सर्वांत पालेभाजी हलकी आहे. यथोत्तर इतर भाज्या पचावयास जड, अधिक जड आहेत. काही भाज्या संस्कारासाठी, काही भाजी म्हणूनच, काही औषधासाठी व काही आहारासाठी उपयुक्त. त्या अवष्टंभक व वातूळ आहेत.

**–वीर**–पु., **वनस्पति० जीवन्तः** ( रापरि. ७.८९ ) जीवशाक नावाने माळव्यात प्रसिद्ध. तांबड्या पानाची व मऊ काड्याची भाजी. पोकळा.

**–श्रेष्ठा**–स्त्री., **वनस्पति० जीवन्ती** ( ध. १.१४० ) हरीणदोडी.

**अन्या दोडी** ( रापरि. ४.४१ ) दोडी, हरीण दोडीचा प्रकार.

**वृन्ताकी** ( रा. ७.१२८ ) वांगे.

**–सात्म्य**–वि., **शाकस्य सात्म्यं यस्य सः, शाकान्युपशेरते यस्य सः** ( चचि. २९.५३ ) भाजी खाण्याच्या सवईचा. भाज्यांनी ज्याला बरे वाटते तो.

**शाकट**–पु., **वनस्पति० श्लेष्मातकः** ( रा. ११.१४८ ) भोकर.

**–पोतिका**–स्त्री., **वनस्पति० मूलपोती** (रापरि.७.७८) मूलपोती.

**शाकन्ध**–पु., **वनस्पति– कोविदारः** (र. १८.१३९-४१) कांचनार.

**सूरण** ( र. १८.१३९-४१ ) सूरण.

**शाकाङ्ग**–न., **वनस्पति० मरिचम्** ( रा. ६.१३५ ) मरिच, मिरी.

**शाकान्न**–न., **शाकयुक्तभोजनम्** ( सुसू. ४६; सुसू. ४६.४९१ ) भाजी असलेले भोजन.

**शाकाम्ल**–न., **वनस्पति० चिञ्चासारः** ( रा. ११.४१ ) चिंचेचे सार.

**वनस्पति० वृक्षाम्लम्** ( ध. २.९५ ) आम्रातक (आंबाडा) अमसूल ( कोकम. )

**शाकुन**–न., **चित्तप्रकृति० राजससत्वस्यैकः प्रकारः, शाकुनकायः** ( चशा. ४.३८(३) ) राजस सत्त्वाचा प्रकार. पक्ष्याच्या स्वभावाचा.

**–काय**–वि., **राजससत्वभेदः, शाकुन–स्वभावः, तल्लक्षणम्–प्रवृद्धकामसेवी, अजस्राहारः सेविन् अमर्षणः अनवस्थायी च** ( सुशा. ४.९१ ) राजससत्त्व. शकुनिपक्षी स्वभावाचा. अतिशय विषयसेवी. नेहमी खाण्याचाच विचार करणारा, असहनशील, अस्थिर मनाचा.

**शाकुनिक**–पु., **शकुनान् पक्षिणो हन्ति इति पक्षिणां हन्ता, व्याधः, मृगयुः** ( सुसू. २.८ ) शकुनवगैरे पक्ष्यांना मारणारा, व्याध, शिकारी.

**शाकुनेय**–पु., **ऋषि० रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः** ( चसू. १.१३ ) शाकुनेय महर्षि. रोगनाशन विचाराकरिता हिमालयाच्या परिसरात जमलेल्या महर्षींपैकी एक.

**शाकुन्तिक**–पु., **पक्षि०** ( चसू. २९.१० ) शाकुन्तिक पक्षी.

**शाकुन्तेय**–पु., **महर्षि०** ( चसू. २६.३ ) महर्षीचे नाव.

**शाकर**–पु., **सोम०** ( सुचि. २९.७. ) **द्र० ' सोम '** सोम वनस्पतीचा प्रकार.

**शाखा**–स्त्री., **हस्तौ पादौ च** (ड) **चतस्रः शरीरस्य शाखाः** (सुशा.५.३ ) हातपाय शरिराच्या चार शाखा.

**रसादयो धातवः** ( चसू. २८.३१ ) रसादिक धातु.

**रक्तादयो धातवः, त्वक् च बाह्यो रोगमार्गः** ( चसू. ११.४८ ) रक्तादि धातु व त्वचा. बाह्यरोगमार्ग.

**आयुर्वेदाऽपरपर्यायः** ( चसू. ३०.३१ ) आयुर्वेदाच्या अनेक पर्याय शब्दांपैकी शब्द.

**वृक्षशाखा** ( सुसू. ७.१५ ) झाडाची फांदी.

**–कण्ट**–पु., **वनस्पति० स्नुही** ( रा. ८.३५५ ) त्रिधारी निवडुंग.

**–दष्ट**–वि., **हस्तपादादौ दष्टः** ( सुक. ५.३-४ ) हातापायाला चावलेला.

**–वात**–पु., **रोग० शाखागतवातः** ( अहसू. ५.२८ ) हातपाय या शाखांमध्ये दुष्ट झालेला वात.

**–वातहर**–वि., **शाखागतवातः, तं नाशयतीति** ( चसू.२७.२२१ ) शाखेमध्ये गेलेल्या—हातापायातील वायूला ठीक करणारा.

**–संस्थ**–वि., **शाखासु स्थितः** ( अहसू. १७.२९ ) शाखांमध्ये असणारा.

**शाखाद**–पु., **प्राणि० छागः** ( असंसू. ६.११४) शेळी, बकरी.

**हस्ती** ( असंसू. ६.११४ ) हत्ती.

**शाखादमेदस्**–न., **अजमेदः** ( असंसू. ६.११४ )
कोवळ्या फांद्या खाणाऱ्या प्राण्याचा बकऱ्याचा मेद.
**हस्तिमेदः** ( असंसू. ६.११४ ) हत्तीचा मेद.

**शाखानिल**–पु., **करादिषु रक्तादिषु वा गतो वायुः** ( चचि. १२.३८ )
शाखेमध्ये गेलेला वायु. हातापायात किंवा रक्तादि धातु व त्वचा यात गेलेला वात.

**शाखानुसारिन्**–वि., **शाखागतः** ( चचि. ३.२८९-२९० )
शाखांमध्ये गेलेला, पहा ' शाखानिल'.

**शाखाम्लभेदन**–न., **वनस्पति० चुक्रम्** (रा. १५.२९२)
चुका.

**शाखाल**–पु., **वनस्पति० वानीरः** ( रापरि. ९.१७ )
जलवेतस.

**शाखाश्रितमर्मन्**–( परिव० ) न., **शाखाखाश्रितं मर्म** ( चसि. ९.३ ) द्र० ' **मर्मन्** '
हातापायांमधील मर्म.

**शाखिन्**–पु., **वनस्पति० पीलुः** ( ध. ५.५१ ) पीलू.

**शाखोट**–पु., **वनस्पति० तद्गुणाः–तिक्त उष्णः पित्तकृद्वातहारी** ( रापरि. ९.३० ) **वल्सिद्धं तैलं अपचीरोगहरम्** ( सुचि. १८.२३ )
सागविशेष, हेदी–कडू, उष्ण, पित्तकारक, वात नाश. अपचीरोग नाहीसा करणारी वनस्पती.

**शाखोटक**–पु., **वनस्पति० शाखोटः** ( सुचि. १८.२३ )
सागाचा प्रकार, हेदी.

**शाङ्ख**–न., **शङ्खस्य इदमिति शाङ्खम् ( चूर्णम्)** ( सुउ. १०.१५ )
शंखाचे चूर्ण.

**शाटक**–पु., न., **वस्त्रपट्टम्** ( सुशा. ८.८ ) **वस्त्रखण्डम्** ( अहृसू. १७.५ )
कापडाचा पट्टा. वस्त्राचा तुकडा, छाटी.

**शाण**–पु., **मान० त्रयो माषकाः शाणः** (चक. १२.८९)
तीन मासे ¼ तोळा
**कर्षचतुर्थांशः** ( अहृसू. ७.२८ ) द्र० ' **मान** '
पाव तोळा.

**शाण्डाकी**–स्त्री., **व्यञ्जन० शिण्डाकी** ( चचि. २१.१८ )
" **शिण्डाकी राजिकायुक्तः स्थान्मूलकदलद्रवैः, सर्षपस्वरसैर्वापि शालिपिष्टकसंयुतैः** " (भाप्र.)
मुळ्याच्या पानांच्या रसात किंवा मोहरीच्या पानांच्या रसात तांदळाचे पीठ घालून त्याला मोहरी लावून केलेले तोंडी लावणे शांडाकी होय.

–**वटक**–न., **कृतान्न० शाण्डाक्यां स्थापितं मुद्गादि-वटकम्** ( अहृसू. ६.३४ )
शांडाकीमध्ये घातलेल्या मूग इत्यादींचा वडा. पहा ' शांडाकी '

**शाण्डिल्य**–पु., **ऋषि० रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः** ( चसू. १.१० )
रोगनाशनाचा विचार करण्याकरिता हिमालयाच्या परिसरात एकत्र जमलेल्या महर्षींतील एक ऋषि.
**वनस्पति० बिल्वः** ( ध. १.१०६ ) बेल.

**शातकुम्भ**–न., **खनिज० सुवर्णम्** (सुउ.१०.९;ध.६.१ )
सोने.

**शातन**–(परिव०) न., **नाशः** (सुचि. ६.१२) **विदारणम्** ( अहृसू. ३०.३६ )
नाश, विदारण.

**शाद्वल**–न., **वनस्पति० नवतृणम्** ( चचि. १०.४८-४९ )
नवे गवत, हिरवळ, दूर्वा.
**नीलदूर्वा**, द्र० ' **दूर्वा** ' ( ध. ४.१४३; असंउ.२४)
नीळी दूर्वा, हिरवी दूर्वा.
वि., **वर्णतो हरितम्** (असंनि. ८.९) हिरव्या रंगाचे.

**शान्त**–वि., **उत्सन्नम्** ( चचि. १५.४ )
नाहीसे झालेला, नष्ट झालेला.
पु., **वनस्पति० दमनम्** ( ध. ३.६६ ) दवणा.

**(शान्ता)**–स्त्री., **वनस्पति० नीलदूर्वा**, द्र० ' **दूर्वा** ' ( रा. ८.२२६ )
नीलदूर्वा.
**शमी** ( रा. ८.१५२ ) शमी.
**रेणुका** ( रा. ६.१०० ) एक सुगंधी द्रव्य.
**आमलकम्** ( रा. ११.३२५ )

–**ज्वर**–पु., **लीनो ज्वरः** ( सुउ. ३९.१६४ )
चोरटा ताप, बारीक ज्वर.

**शान्ताङ्गार**–वि., **निर्वाणाङ्गारसदृशः कृष्णः** ( चक्र. चचि. २१.३६ )
विस्तव विझल्यानंतर दिसणाऱ्या कोळशासारखी काळी त्वचा.

**शान्तनु**–पु., **कुधान्य० कोरदूषकादीनामेकतमः** ( सुसू. ४६.२१ )
बारीक धान्य, वरी, हरीक या जातीचे धान्य.

**शान्तात्मन्**–वि., **शान्तस्वभावः** ( सुउ. ६०.१२ )
शांत स्वभावाचा.

**शान्ति**–स्त्री., **शमनम्** ( चनि. ८.३० ) शमणे, शांतता,

चिकित्सा ( चनि. ८.३०-३१ ) चिकित्सा, उपचार.
भेषजम् ( चनि. ८.३०-३१ ) औषध.
विरजः, ब्रह्म (चशा.५.२३) शांतीचे पर्याय शब्द.
परमक्षरमव्ययममृतं, विपापं, शान्तं, निर्वाणम् ( चशा. ५.२३)
हे शांतीचे पर्याय आहेत.
**–कर्मन्**-न., चिकित्सा ( सुसू. ३.२६ ) चिकित्सा.
अथर्ववेदोक्तं देवाद्युपसृष्टचेतसां देवादिग्रहशमनार्थं या क्रिया क्रियते, सा ( सुसू. १.८. ( ४ )
वेदोक्तमन्त्रैर्यजनादिकम् (सुसू. ६.२०)
देवादिकांनी केलेल्या उपसर्गावरील अथर्ववेदामध्ये सांगितलेल्या ग्रहशांतीच्या क्रिया.

**शापापशमनी**–स्त्री., वनस्पति० शमी ( रा. ८.१५२ )
शाप नाहीसा करणारी, शमी.

**शापित**–पु., वनस्पति० श्लेष्मातकः ( ध. ५.९४ )
भोकर.

**शाबर**–पु., वनस्पति० लोध्रः (रा. ६.२३९) लोध्र, रोध्र.
क्रमुकः, लोध्रभेदः द्र० ' लोध्र ' ( रा.६.२४१ )
लोध्राचा प्रकार.
धान्य० शालिभेदः द्र० ' शालि ' ( ध. ६.७० )
साळीचा प्रकार. धान्यभेद.
**–लोध्र**–पु., वनस्पति० द्र० 'लोध्र' (असंसू. १६.२०)
लोध्र, रोध्र.

**शाबरक**–पु., वनस्पति लोध्रः (ध. ३.१७५) रोध्र, लोध्र.
**–लोध्र**–पु., वनस्पति० लोध्रभेदः, द्र० ' लोध्र ' ( अहसू. १५.२६ )
रोध्र, लोध्र.

**शामाम्ली**–स्त्री., वनस्पति० नीलाम्ली ( रापरि. ४.३८ )
लांब शाखा असलेली वनस्पती.

**शाम्भव**–पु., वनस्पति० वसुकः ( रा. १०.३४ )
रुई, मांदार.
निर्यास० गुग्गुलुः ( रा. १२.१८४ ) गुग्गुळ.
कर्पूरः ( १२.५६ ) कापूर.
वनस्पति० देवदारुः ( रा. १२.१०३ ) देवदार.

**( शाम्भवी )**–स्त्री., वनस्पति० नीलदूर्वा द्र० ' दूर्वा ' (रा. ८.२२६)
निळी दूर्वा.

**शारङ्ग**–पु.,प्रतुदपक्षि० ( चसू. २७.५३ ) द्र० ' प्रतुद '
भक्ष्याला टोचून खाणारा पक्षी.

**शारद**–पु., ऋषि० प्राचीनो रसाचार्यः (र. ६.४९-५३ )
शारद नावाचे रसशास्त्राचे ऋषी.
धान्य० शरत्कालीनशालिः द्र० ' शालि ' ( चसू. २७.१४ )
शरदृऋतूतील साळ, भात.
षष्टिकभेदः, द्र० ' षष्टिक ' ( ढ. सुसू. ४६.८ )
साठे तांदळाचा प्रकार.
व्रीहि० द्र० ' व्रीहि ' ( अहसू. ६.९ )
तांदळाचा प्रकार.
मुद्गभेदः द्र० ' मुद्ग ' ( रा. १६.१३० )
मुगाचा प्रकार.
वनस्पति० काशः ( रा. ८.२०० ) कसाड गवत.
न., पुण्डरीकम् ( ध. ४.१४८ ) पांढरे कमळ.

**( शारदा )**–स्त्री., वनस्पति० सारिवा ( ध. १.१६१ )
अनंतमूळ.

**( शारदी )**–स्त्री., वनस्पति० ब्राह्मी ( रा. ५.१४९ )
ब्राह्मी.
महाराष्ट्री ( रापरि. ४.१२ ) मराठी, मराठीचे बोंड.
जलपिप्पली ( ध. ४.६४ ) जलपिंपळी, पानपिंपळी.
**–मुद्ग**–पु., धान्य०हरितमुद्गः स हि प्रायः शरदि भवति ( चक्र. चचि. १०.४६ ) द्र० ' मुद्ग '
हिरवा मूग. हा बहुधा शरद् ऋतूत होतो.

**शारदिक**–पु., वनस्पति० बकुलः ( रा. १०.२६२ )
बकुळ.

**( शारदिका )**–स्त्री., वनस्पति० वालुकम् (रा. ७.२५०)
वालुक.

**शारपद**–पु., विष्किरपक्षि० मल्लकङ्कः ( चसू. २७.४९ )
द्र० ' विष्किर '
जमिनीवर उकर उकरून भक्ष्य वेचणारा पक्षी.

**शारिका**–स्त्री., पक्षि० सारिका ( चचि. २३.२५३ )
मैना.
**–मुख**–पु., वायव्यः कीट० ( असंउ. ४३ )
वातप्रकृतीचा कीटकविशेष.

**शारिन्**–पु., वनस्पति० शरपत्रः ( रा. ८.२०९ )
लहान दर्भ, मऊ दर्भ, मृदु दर्भ.
मुञ्जः ( रा. ८.२०४ )
मुञ्जतृण, मुंजागवत, मोळ.

**शारीर**–वि., शरीरे संजातः ( चचि. ३.३६ )
शरीरस्येदम् शरीरसम्बन्धि ( असंशा. १२.३३ )
शरिरामध्ये उत्पन्न झालेला शरिरसंबंधी, शरिराचे.
**–व्याधि**–पु., वातादिवैषम्यनिमित्तो व्याधिः ( सुसू. १.४ )

वातादिकांच्या वैषम्यामुळे उत्पन्न होणारा निज व्याधी.

**–व्रण**–पु., **रोग० व्रणः** ( मा. ) व्रण, जखम.

**–शल्य**–न., **शरीराबाधकरम् दुष्टं दोषधातुमलादि द्र० 'शल्य'** ( सुसू. २६.६ )
शरिराला त्रास देणारे दुष्ट झालेले दोष धातुमल इ० सलणारे शल्य.

**–स्थान**–न., **शरीरस्येदं शारीरम्, चरकसंहितायां चतुर्थं स्थानम्** ( चशा. ८.६९ ) **सुश्रुतसंहितायां तृतीयं स्थानम्, चिकित्साऽधिष्ठानभूतशरीरमधिकृत्येदं स्थानमुपदिष्टम् अतः शारीरस्थानमिति साधु** ( सुशा. १ )
शरिराची माहिती देणारे प्रकरण, चरकसंहितेचे ४ थे प्रकरण व सुश्रुत संहितेचे ३ रे प्रकरण. चिकित्सेचे अधिष्ठान असलेले शरीर दृष्टीपुढे ठेवून ते प्रकरण उपदेशिले आहे म्हणून शारीरस्थान असे म्हटले आहे.

**शारीरी-शलाका**–( परिव० ) स्त्री., **शलाका० शृङ्गादिजा शलाका** ( सुउ. १८.६३ )
शरिरापासून झालेल्या शलाका, शृंग. साळईचे पीस ( सळईसारखे ) इत्यादी.

**शार्कर**–पु., **आसुत० मद्यभेदः** ( चसू. २६.८४ ) **शर्कराप्रकृतिक आसवः, गुडशर्करया खण्डशर्करया वा क्रियते । तद्गुणाः–मधुरो रुच्यः; मुखप्रियः ( च ) दीपनः; सुगन्धिः, सुखमदो हृद्यो वर्ण्यो जरणीयः; इन्द्रियबोधनो वातघ्नः; बस्तिरोगनुच्च** ( चसू. २७.१८३; सुसू.४५.१८३ )
साखरेचे तयार केलेले आसव. गुळाच्या साखरेचे किंवा खडीसाखरेपासून तयार करतात. आसवाचे गुण— मधुर, रुचकर, आवडणारे, दीपक, सुगंधि, सुखकारक, मद उत्पन्न करणारे, हृदय वर्ण यांना हितकर, जिरण्यास योग्य, इंद्रियांना उत्तेजित करणारे, वातनाशक, बस्तिरोग नाहीसे करणारे.

**शार्ङ्ग**–वि., **महिषादिशृङ्गमयं ( यन्त्रम् )** ( सुनि. ६.११ )
**भाजनादि शृंगनिर्मितम् तत्र लवणरसप्रधानमञ्जनं स्थापयेत्** ( सुउ. १८.६१-६२ )
म्हैस इत्यादिकांच्या शिंगाचे केलेले यंत्र, भांडे इत्यादी. या भांड्यात मीठ इत्यादी खारट प्रधान द्रव्ये व अंजन ठेवावे.
**न., वनस्पति० आर्द्रकम्** ( ध. २.८५ ) आले.

**शार्ङ्गष्टा**–स्त्री., **वनस्पति० गुञ्जा** ( असंसू. १४.३ ) गुंज.
**काकजङ्घा** ( र. १२.९७-९८ ) कावळीचा प्रकार.
**काकमाची** ( र. १२.९७-९८ ) कावळी.

**शार्ङ्गष्टादिकवर्ग**–पु., **द्रव्यगण० शार्ङ्गेष्टा, कण्टकारी, करीरस्तिलपर्णिकेन्द्रवारुणी मुस्ता, हरिद्रा, पिप्पली, धत्तूरः, कटुतुम्बी, तिन्तिण्यपामार्गोऽङ्कोलमूलमित्येतेषां वर्गः, अयं सन्निपातहरः** ( र. १२.९७-९८ )
शार्ङ्गष्टादिवर्ग. कावळी, रिंगणी, नेवती, तिळवण, कडू इंद्रावण, नागरमोथा, हळद, पिंपळी, धोत्रा, कडू भोपळा, चिंच, आघाडा, अंकोळमूळ. हा संनिपातहर आहे.

**शार्ङ्गाख्य**–पु., **प्रतुदपक्षि०** ( असंसू. ७.७२-७५ )
**द्र० 'प्रस्तुद'**
भक्ष्याला टोचून टोचून खाणारा, एक पक्षी.

**शार्ङ्गेष्टा**–स्त्री., **वनस्पति० गुञ्जा** (चचि. २७.३३) गुंज.
**काकजङ्घा** ( सुचि. २३.१२ ) कावळीचा प्रकार.
**काकमाची** ( सुसू. ३८.६-७ ) कावळी.
**यवतिक्ता** ( सुसू. ३८.५४-५६ ) मुंगुसवेल.
**अङ्गारवल्ली, करञ्जभेदः, द्र० 'करञ्ज'** ( रा. ९.१८२ )
करंजाचा प्रकार. महाकरंज, सागरगोटा.
**शाक० काकतिक्ता, तद्गुणाः–तिक्ता, कटुविपाका, शीता, कफपित्तहरा च** ( चसू. २७.९६ )
एक भाजी. कडू, पचल्यानंतर तिखट, थंड, कफ पित्त हारक.
**भम्भुरुट्टाको वेष्टितफलः काकमाच्यनुकारः** ( ड. सुचि. ३७.३६ )
कावळीच्या फळासारखे फळ असलेली वनस्पती.

**शार्दूल**–पु., **वनस्पति० चित्रकः** ( रा. ६.१२४ ) चित्रक.

**शाल**–पु., **वनस्पति० सर्जकः** ( चसू. ४.१८; ध. ५.१२३; सुसू. ३९.६ ) राळ
**शङ्कुः, वृक्षविशेषः** ( ड. सुचि. १९.३३-३४ ) सालवृक्ष.
**लकुचः** ( रापरि. ९.४४ ) ओटीचे फळ.
**निर्यास० रालः** ध. ३.१२१ ) राळ.

**–कल्याणी**–स्त्री., **वनस्पति० शालिञ्चः** ( चसू. २७.१०२ )
एक वनस्पती.

**–निर्यास**–पु., **निर्यास० धूमद्रव्यमिदम्** ( रा. ९.२०५; सुउ. ५१.५१ )
धूप.

रालः ( ध. ३.१२१ ) राळ.

**–पर्णी**–स्त्री., वनस्पति० शालिपर्णी ( चसू. २.२०; ( सुचि. ११.१० )

सालवण.

**–रस**–पु., निर्यास० रालः ( रा. १२.१७७ ) राळ.

**–सारादिगण**–पु., वनस्पतिसमूह० (सुसू. ३८.८–९)
सागाचा नार वगैरे औषधांचा गण.

**–सारादिलेह**–पु., सिद्धौषधि० लेह० तद्गुणः–सर्वमेहनाशकः ( सुचि. १२.१० )
सागाचा नार वगैरे औषधीगणाचा तयार केलेला लेह.

**शालन**–न., व्यञ्जन० अवदंशः, येन सहान्नं भोक्तुं युज्यते ( अरु. अहृसू. ६.१०६ )
तोंडी लावणे. चटणी, कोशिंबीर, शेवगा इ० ज्यांच्या बरोबर आहार घेतला असता जेवण चांगले जाते.
हरितकम्, यदुपदंशेषु युज्यते येन च व्यञ्जनं वास्यते ( हे. अहृसू. ६.१०६ )
तोंडी लावणे, जे जेवणाचे अगोदर मध्ये, नंतर उपदंशात चटणी सारखे व चटण्यातून वापरले जाते ते.

**शालाक्य**–न., आयुर्वेदाङ्ग० शलाका शालाक्यतन्त्रम् ( चसू. ३०.२८ )
आयुर्वेदशास्त्राचे एक अंग. सळईच्या सहाय्याने केले जाणाऱ्या उपचाराचे व त्या उपचाराचे रोग यांचे शास्त्र.

**–तन्त्र**–न., शलाकया क्रियते इति शालाक्यं, तदेव तन्त्रम्, विशेषेण ऊर्ध्वजत्रुविभागरोगेषूपयुक्तम् ( चचि. २६.१२३ ) नेत्रकर्णशिरोघ्राणेत्याद्यूर्ध्वाङ्गगतविकाराणां निरूपकं तन्त्रम् ( सुउ. १.५ )
शलाकेचा ज्यामध्ये विशेष उपयोग करून चिकित्सा ( शस्त्रकर्म, शल्यकर्म ) केली जाते असे तंत्र. मानेच्या वरील रोगात विशेष उपयोगी. डोळे, कान, नाक, डोके, वगैरे विकार हे ऊर्ध्वगत होत.

**शालाग्नि**–पु., अग्निशालास्थो गार्हपत्याग्निः ( काशा. ८ )
अग्निशालेमध्ये असणारा पश्चिम कुंडातील अग्नि, गार्हपत्य–अग्नि.

**शालामर्कटक**–न., वनस्पति० चाणक्यमूलम् ( ध. ४.३५ )
एक प्रकारचा मुळा.

**शालामुख**–पु., धान्य० कृष्णकृष्णशुक्लाकारतण्डुलाः ब्रीहिभेदाः द्र० 'ब्रीहि' ( सुसू. ४६.१२ )
ब्रीहीजातीच्या तांदळाचे प्रकार. काळ्या पांढऱ्या रंगाचे प्रकार.

**शालावृकी**–स्त्री., रेवतीग्रहगृहीतरूपम् ( का रेवतीकल्प ७ )
रेवतीग्रहस्वरूप.

**शालि**–पु., स्त्री., धान्य० ( चसू. २७.९-१५; सुसू. ४६.४-७; रा. १६.७८; पृ. २२० ) लोहितशालिकलमकर्दमकपाण्डुकसुगन्धकशकुनाहृतपुष्पाण्डकपुण्डरीकमहाशालिशीतभीरुकरोध्रपुष्पकदीर्घशूककाञ्चनकमहिषमहाशूकहायनकदूषकमहादूषकप्रभृतयः शालयः ( सुसू. ४६.४ ) सामान्यगुणाः– रसे विपाके च मधुरा, शीता, स्निग्धा, लघ्वी, बलावहा, पित्तघ्नी, अल्पवातकफकरी बद्धाल्पवर्चा सर्वासु शालिषु लोहितकशालिः श्रेष्ठा, तद्गुणाः– स्वर्या, चक्षुष्या, हृद्या, शुक्रमूत्रला, वर्णबलकरी, त्रिदोषघ्नी, तृष्णापहा, व्रण्या, ज्वरघ्नी विषापहा च ( सुसू. ४६.५-७ ) अकण्डितशुक्ला हैमन्ताः शालयः, अन्ये तु कण्डितशुक्ला अकण्डितशुक्लाश्च हैमन्ताः, ग्रैष्माः, षष्टिकाः, वार्षिकास्तु व्रीहयः, 'कण्डितशुक्लास्तु व्रीहयः' इत्यन्ये
(ड. सुसू. ४६.४; असंसू. १५.२२; अहृसू. ६.३) षष्टिशालिः कृष्णाली रक्तशालिः मुण्डशालिः महाशालिः सूक्ष्मशालिः गन्धशालिरित्येवं शालिर्बहुविधः गौरनीलभेदेन षष्टिशालिः द्विधा । गौरशालिगुणाः–रुच्यः शीतलो दोषहारी बल्यः पथ्यो दीपनो वीर्यवृद्धिं च करोति । नीलशालिस्त्वेतस्मात्किञ्चिदूनगुणः । कृष्णशालिगुणाः–त्रिदोषघ्नो मधुरः पुष्टिवर्धनः वर्णकान्तिकरो बल्यो दाहजिद्वीर्यवृद्धिकृच्च । रक्तशालिगुणाः–सुमधुरो लघुः स्निग्धो बलावहः रुचिकृद्दीपनः पथ्यो मुखजाड्यरुजापहः सर्वामयहरो रुच्यो पित्तदाहानिलास्रजिच्च ।
मुण्डशालिगुणाः–त्रिदोषघ्नो मधुराम्लो बलप्रदः । महाशालिगुणाः–स्वादुर्मधुरशिशिरःपित्तशमनो ज्वरं जीर्ण–दाहं जठररुजमाशु शमयेत् । बालतरुणवृद्धानां हितत्वेन सदा सेव्यः सर्वैरनलबलवीर्याणि चासौ कुरुते ।
सूक्ष्मशालिगुणाः–समधुरो लघुः पितास्रदाहनुत् दीपनः पाचनः किञ्चिद्वातविकारजिच्च; गन्धशालिगुणाः–मधुरोऽतिवृष्यः पित्तश्रमास्रारुचिदाहशान्तिदः स्तन्यो गर्भस्थिरतात्पवातदः पुष्टिप्रदः अल्पकफो बल्यश्च ( ध. ६.८४-९४ )

हिं.—चावल.

**म.—भात.**

गु.—शाल्य.

बं.—शालिधान्य.

फा.—विरंज.

भात—( ज्याचें टरफल काढून तांदूळ निर्माण होतो ते. )

या भाताचे लोहित, कलम, कर्दमक, पांडुक, सुगंधक, शकुन, पुष्पाण्डक, पुंडरीक, महाशालि, शीतभिरुक, रोध्रपुष्पक, दीर्घशूकक, अंजनक, महाशूक, हायनक, दूषक, महादूषक, इत्यादि प्रकार आहेत ते वर आहेत.

भाताचे सामान्य **गुण**—रस आणि विपाक मधुर, शीत, स्निग्ध, लघु, बलवर्धक, पित्तनाशक, थोडेसे वात आणि कफ यांना निर्माण करणारे आहे. तसेच मलावष्टंभ व मलाचे प्रमाण अल्प करणारे आहे. सर्व शालींमध्ये लोहितकशाली ( भात )श्रेष्ठ आहे. त्याचे **गुण**—स्वर, नेत्र, हृदय यांना हितकर शुक्रमूत्र-वर्धक, वर्ण बल करणारे, त्रिदोषनाशक, तृष्णा-नाशक, व्रणरोपक, ज्वरनाशक, विषनाशक आहे. न कांडता पांढऱ्या दिसणाऱ्या व हेमंतात होणाऱ्यांना साळी म्हणतात. कांडता वा न कांढता पांढऱ्या दिसणाऱ्या त्या साळी होत असे एक मत आहे. ग्रीष्मऋतूत होणाऱ्यांना षष्टिक, वर्षाऋतूत होणाऱ्यांना व्रीही नाव आहे. कांडलेल्या पांढऱ्या वर्णाच्या साळीनाही व्रीही म्हणावे असे दुसरे मत आहे.

षष्टिशाली, कृष्णशाली, रक्तशाली, मुंडशाली, महाशाली, सूक्ष्मशाली, गंधशाली असे साळीचे पुष्कळ प्रकार आहेत. गौर आणि नील असे साठे-साळीचे दोन प्रकार आहेत.

**गौर साळीचे गुण**— रुचिकर, शीतल, दोष-नाशक, बलकर, पथ्यकर, अग्निदीपक आणि वीर्य-वृद्धिकर आहेत.

**नील साळीचे गुण**— गौर साळीहून काहीसे कमी आहेत.

**काळ्या साळीचे गुण**— त्रिदोषघ्न, मधुर, पुष्टिकारक, वर्ण व कान्ती वाढविणाऱ्या, बलकारक, दाहनाशक, आणि वीर्यवर्धक आहेत.

**तांबडया साळीचे गुण**— अत्यंत मधुर, पचनास हलक्या, स्निग्ध, बलकारक, रुचिकर, अग्निदीपक, पथ्यकारक, तोंडाचे जाड्य व पीडानाशक, सर्व रोगनाशक, पित्त, दाह, वात आणि रक्तदोष-नाशक आहे.

**मुंड साळीचे गुण**— त्रिदोषनाशक, मधुर, अम्ल, बलकारक.

**महासाळीचे गुण**— स्वादिष्ट, मधुर, थंड, पित्तशामक, जीर्णज्वर, दाह व पोटदुखी त्वरित शमवितात. बाल, तरुण, वृद्धांना हितकर असल्याने नित्य सेवनीय आहेत. ह्या सर्व गुणांनी अग्नि, बल, वीर्य वाढवतात.

**सूक्ष्म साळीचे गुण**-किंचित मधुर, हलक्या, पित्त, रक्तदाह शामक, दीपन, पाचन, आणि किंचित वातविकारनाशक.

**गंधशाली गुण**-मधुर अति वृष्य, पित्त, श्रम रक्तदोष अरुचि व दाह शामक स्तनात दुग्धोत्पादक गर्भस्थैर्यकर, किंचित वातूळ, पुष्टिकारक, थोडा कफकरणाऱ्या व बलकर आहेत.

**–दला**-स्त्री., शालिपर्णी ( रा. ४.११५ ) सालवण.

**–पर्णी**-स्त्री., **वनस्पति० गुणाः-स्वादुः तिक्तोष्णा गुरु-वृष्या, रसायनी, पुष्टिदा क्रिमिप्रणुत्, विषमज्वर-वातघ्नी, मेहार्शःशोथसन्तापज्वरश्वासविषापहा, त्रिदोषशोषच्छर्दिघ्नी क्षतकासातिसारजिच्च** ( ध. १.८७ पृ. २३ ) **श्वयथुहरगणे प्रोक्तम् एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१६ )

हिं.—शालवन.

**म.—सालवण.**

गु.—शालिपर्णी.

बं.—शालपानि.

ता.—मेर्मल्लि.

सालवण. गुण— गोड, कडू , उष्ण, जड, शुक्राला हितकर, रसादी धातु उत्तम दर्जाचे करणारी, शक्तिदायक, कृमिनाशक, मूळव्याध, सूज, अंग तापणे, श्वास, विष, त्रिदोष, क्षय, वांती, उरःक्षताचा खोकला व अतिसारनाशक.

**वनस्पति० माषपर्णी** (रा.३.१७१; असंसू. १३.३ ) रानउडीद.

**–पर्णीका**-स्त्री., **वनस्पति० शालिपर्णी** ( असंसू. १५.२६ ) सालवण.

**–पिष्ट**-न., **शालीनां पिष्टम्** ( सुचि. ३.७ ) शाली जातीच्या तांदळाचे पीठ.

**–प्रवर**–पु., शालिभेदः द्र० ' शालि ' ( ध. ६.६९ )
साळीचा प्रकार. उत्तम जातीचा एक तांदूळ.

**–षष्टिकमूल**–न., **शालिषष्टिकस्य मूलम्, गर्भस्थापनार्थमुपयुक्तम्** ( चशा. ८.२४; पृ. २१९ )
शाली जातीच्या तांदळाचे व सांठे तांदळाचे ( भाताचे ) मूळ, गर्भस्थापनेसाठी उपयुक्त.

**शालिन**–न., वनस्पति० **पद्मकन्दः** (ध. ४.१६३; पृ. १६७)
कमळाचा कंद.

**शालीन**–वि., **आश्रमवासी** ( चचि. १(४).३ )
आश्रमवासी.
पु., **वनस्पति० मिश्रेया** ( ध. २.४; पृ. ६९ )
बडीशेप.
न., **वनस्पति० पद्मकन्दः** (ध. ४.१६३; पृ. १६७)
कमळाचा कंद.

**शालीना**–स्त्री., वनस्पति० **मिश्रेया** (ध. २.४; पृ. ६९)
बडीशेप.

**शालुक**–पु., वनस्पति० **पद्मकन्दः** (ध. ४.५६; पृ. १४५)
कमळाचा कांदा.

**शालू**–पु., वनस्पति० **पद्मकन्दः** ( सुउ. ५४.४ )
कमळाचा कंद.

**शालूक**–पु., **कण्ठरोग० कण्ठशालूकः** (सुनि. १६.५१)
**तल्लक्षणम्–गले कफसंभवः कोलास्थिमात्रः कंटकशूकभूतः खरः स्थिरः ग्रंथिर्भवति । शस्त्रसाध्योऽयम्** ( सुनि. १६.५१ )
गळयातला रोग. चिन्हे–गळयात कफ होतो. बोराच्या आठळी एवढी, काट्यासारखी सलणारी खरखरीत, स्थिर अशी गाठ होते. शस्त्राने बरी होते.
**शाक० शाकमस्य गुरु विष्टम्भि शीतलं च,** ( चसू. २७.११६ )
या नावाची भाजी. ही जड, अवष्टंभक, थंड आहे.
**वनस्पति० पद्मकन्दः, तद्गुणाः–कटुरुष्णो रुच्यः सुखप्रसवकर्मा कफवातघ्नो नेत्रामयरक्तदोषहरश्च** ( ध. ४.५६; चचि. ३०.८९-९० )
कमळकंद. गुण— तो तिखट, उष्ण, रुचकर, सुखप्रसूतिकारक, कफवात–नेत्ररोग व रक्तदोषनाशक.
**वनस्पति० जातीफलम्** ( ध. ३.२५; पृ. १०२ ( अहसू. ६.९१ )
जायफळ.

**–कन्द**–पु.,वनस्पति० **पद्मकन्दः** ( सुसू. ४६.४६४ )
कमळकंद.

**शालेय**–पु., वनस्पति० **चाणक्यमूलम्** ( चसू. २७.१७० )
मुळ्याचा एक प्रकार. मोठा मुळा.
**वनस्पति० मिश्रेया** ( ध. २.४; पृ. ६९ )
बडीशेप.

**शाल्मल**–पु., वनस्पति० **शाल्मली** ( ध. ५.१२६ )
सावरीचा वृक्ष.

**शाल्मलक**–पु., वनस्पति० **मोचरसः शाल्मलीवृक्षः** ( असंक. ४ )
मोचरस, सावरी वृक्ष.

**शाल्मलि**–स्त्री., **वृक्ष० शाल्मली** ( सुउ. ४५.३४ )
सावर.

**–पत्रक**–पु., वनस्पति० **सप्तपर्णः** ( ध. ३.८०; पृ. ११२ )
सातवीण.

**–पुष्प**–न., **शाक०** ( चसू. २७.९९ )
सावरीची फुले.

**–वेष्ट**–पु., **निर्यास० मोचरसः** ( रा. ८.२१५; पृ. १९६ )
सावरीचा चीक, डिंक. मोचरस.

**शाल्मलिक**–पु., वनस्पति० **रोहितकः** (ध. ५.१३०) पृ. १९६ )
रगतरोडा, रक्तरोडा.

**शाल्मली**–स्त्री., वनस्पति० **गुणाः–मधुरा, कषाया, शीता, स्निग्धा, शुक्रलश्लेष्मलबल्यकारिणी, च** (ध. ५.१२६; पृ. १९५) **अतिसारशूलघ्नी पिच्छाबस्त्युपयुक्ता च** ( सुउ. ४०.११३ )
हिं.—शेमुर.
**म.—सावरी.**
गु.—शेमलो.
बं.—सिमुलगाध.
ता.—पूरणि.
सावरी. गुण— गोड, तुरट, शीत, स्निग्ध, शुक्र–कफ बलकारक; अतिसार-शूल नाशक; पिच्छा–बस्तीला उपयुक्त.
**वृक्ष० दध्ना संस्कृताऽतीसारशूलविनाशिनी पिच्छाबस्त्युपयुक्ता च** ( सुसू. ४०.११३; असंसू. १५.३२ )
ह्या झाडाची साल दह्यातून घेतल्यास अतिसार व शूल नाश होतो. शिवाय पिच्छा बस्तीला उपयुक्त.

स्त्री., ( असंसू. ३६.१०; चसू. ४.१५ )
सावर. मलसंग्रहगणामधील एक.

**–कन्द्**–पु., वनस्पति० गुणाः– **मधुरः, शिशिरः, पित्तदाहार्तिशोषसन्तापनाशनः, मलसंग्रहरोधजिच्च** ( रापरि. ७.४६; पृ. ३५१ )
सावरीचा कंद. **गुण**— गोड, थंड, पित्त, आग, वेदना, शोष, तापणे नाहीसे करतो. मळ घट्ट करतो व मळाचा अवरोध नाहीसा करतो.

**–पुष्प**–न., **तूलवृक्ष० गुणाः–तच्च मधुरं, मधुरविपाकं, रक्तपित्तहरं च** ( सुसू. ४६.२८१ )
तूल वृक्ष. गोड, पचल्यानंतरही गोड व रक्तपित्त-हारक.

**–फल**–पु., **वनस्पति० तेजःफलः** ( रापरि. ११.१७; पृ. ३७४ )
सावरीच्या फळासारखी पुष्कळ सुगंधी फळे असणारा काटेरी वृक्ष.

**–फलक**–न., **मण्डलाग्रादिशस्त्राणां धारासंस्थापनार्थं शाल्मलीकाष्ठफलम् उपयुज्यते** ( सुसू. ८.१३. असंसू. ३४.३७ )
सावरीची फळी. मंडलाग्रशस्त्र इत्यादींची धार टिकविण्यासाठी इचा उपयोग करतात.

**–मृदु्**–स्त्री., **शाल्मलीपिच्छा, मोचरसः** ( सुचि. १५.९ )
सावरीच्या सालीमधील बुळबुळीत भाग. मोचरस.

**–वेष्टक**–पु., न., **निर्यास० शाल्मलीनिर्यासकः** ( सुउ. ४०.६९ )
सावरीचा चीक–डिंक.

**–श्लेष**–पु., **शाल्मलीनिर्यासः, मोचरसः** ( चचि. ३०.९१ ) सावरीचा चीक–डिंग.

**शाल्मलुका**–स्त्री., **वनस्पति० शेलूकः** ( असंसू. १४.३ )
शेलूक.

**शाल्यन्न**–न., **व्रीहीनामन्नम्** ( र. २०.१९-२२; अहृसू. ५.३ )
व्रीही जातीच्या तांदळाचे अन्न.

**शाल्योदनोपम**–पु., **वनस्पति० कुन्दः** ( ध. ५.१५०; पृ. २०१ )
कुंद नावाचे पुष्प.

**शाल्वण**–पु., **उपनाह० अयं सुखोष्णः स्पष्टलवणः वातरोगिभ्यश्च सर्वदा हितः** ( सुचि. २२.४; सुउ. ९.६ )



पोटीस. हे सैंधव थोडे अधिक प्रमाणात घालून कोमट असे वातरोग्याला नेहमी हितकारक आहे.

**शाव**–वि., **शवस्येदमिति शावो नाम शवसम्बन्धी (गन्धादिः)** ( चचि. २५.२७ )
प्रेतासंबंधी, प्रेताचा ( दुर्गंध इ० ).

**शास्त्र**–न., **शास्यतेऽनेन शास्त्रम् । आयुर्वेदः, वैद्यकशास्त्रम्** ( चवि. ८.३ ) **विशिष्टविषयस्य प्रकरणम्, यथा–'स्वरभेदादिशास्त्रम्'** ( ड. सुउ. ४१.५५; अहृसू. १२.५६ )
ज्यामुळे नियमांच्या आधाराने शासन होते ते शास्त्र. जसे आयुर्वेदशास्त्र, वैद्यकशास्त्र. विशिष्ट विषयाचे प्रकरण. जसे स्वरभेद इ० शास्त्र.

**–चक्षुस्**–वि., **शास्त्राधारेण सर्वपदार्थानां परीक्षकः** ( चचि ३०.२३१ )
शास्त्राच्या आधाराने सर्व पदार्थांकडे पहाणारा.

**–दृष्ट**–वि., **शास्त्रेण दृष्टं प्राप्तं सिद्धं वा** ( सुशा. ५.४८ )
शास्त्राने सिद्ध किंवा तपासलेले, बरोबर ठरलेले.

**–निश्चय**–पु., **चिकित्सादिशास्त्रनिर्णयः** (सुसू. ४.७)
शास्त्राधाराने केलेला निर्णय. उपचारांचा शास्त्रीय निर्णय.

**–प्रामाण्य**–न., **आगमप्रामाण्यम्** ( सुसू. ४०.३ )
शास्त्राचे प्रमाण, शास्त्राधार.

**–बहिष्कृत**–वि., **शास्त्रे बहिर्भूतः शास्त्रपरम्परीणज्ञानहीनः** ( सुसू. ३.४९ )
शास्त्र येत नसलेला, शास्त्रपरंपराज्ञानहीन.

**–वाद**–पु., **शास्त्रवचनम्, तच्च लोकानुग्रहप्रवृत्तिमूलकमिष्यते** ( चसू. ११.२७ )
शास्त्रवचन. ते लोकांना उपयुक्त होण्याच्या दृष्टीने केलेले असते.

**शिंशप**–पु., **वृक्ष० शिंशपा** ( अहृसू. १५.३२; असंसू. १६.१४ )
शिसवा, शिसव.

**शिंशपा**–स्त्री., ( चक. १.८ )
शिसवा, शिसवी.

**( शिंशपा )**–स्त्री., **वनस्पति० गुणाः– कटुस्तिक्तोष्णा, वर्ण्या, बल्या, रुच्या, कफवातघ्नी, कण्डुबस्तिरोग-हिक्काशोफपित्तदाहाऽतीसाराऽजीर्णहरा च** ( चक. १.८; ध. ५.१२१; पृ. १९४ )

हिं.—शीसव.
**म.—काळा शिसव.**
गु.—शिशम.
बं.—शिशुगाछ.
ता.—इट्टि.
शिसव वृक्ष. **गुण**—तिखट, कडू, उष्ण, वर्णकर, बलकर, रुचिकर, कफ–वातनाशक; खाज, बस्तिरोग, उचकी, सूज, पित्त, दाह, अतिसार व अजीर्ण नाशक.

**–तैल**–न., सारतैल० गुणाः– तिक्तं, कटु, कषायं, दुष्टव्रणशोधनं कृमिकफकुष्ठाऽनिलहरं च (सुसू. ४५.१२३)
शिसवाचे तेल. **गुण**—कडू, तिखट, तुरट, दुष्टव्रणशोधक, कृमि, कफ, कुष्ठ, वातनाशक.

**–सारतैल**–न., तैल० तीक्ष्णं कटुस्रपित्तकृदर्शःकुष्ठकृमिश्लेष्मशुक्रमेदाऽनिलाऽपहम् (असंसू. ६.१०६)
शिसवाच्या गाभ्याचे तेल. तीक्ष्ण, तिखट, रक्तपित्तकारक; मूळव्याध, कुष्ट, कृमि, कफ, शुक्र, मेद आणि वात नाशक.

**–सारधूम**–पु., धूम० शिंशपासारस्य धूमः (चशा. ८.३८)
शिसव वृक्षाच्या आतल्या गाभ्याचा धूर.

**–स्नेह**–पु., तैल० तिक्तकटुकषायः दुष्टव्रणशोधनः कृमिकुष्ठकफानिलहरश्च (सुसू. ४५.१२३)
शिसव्याचे तेल. हे तेल कडु, तिखट, तुरट, दुष्टव्रणशोधक, कृमि, कुष्ठ, कफ व वात नाशक आहे.

**शिंशुमार**–पु., जलचरप्राणि० (असंउ. २२)
मगराच्या जातीचा जलचर प्राणी.

**शिक्य**–न., द्रव्यरक्षणार्थं रज्जुकृत आधारः (चक. १.१३) मुञ्जादिविरचितो द्रव्यरक्षणप्रयोजनः पात्राधारविशेषः (सुसू. ४५.१८)
शिंके. द्रव्य रक्षणार्थ केलेला दोऱ्यांचा आधार. मुंज इ० वळून द्रव्यरक्षणार्थ पात्राला आधार म्हणून केलेली विशिष्ट वस्तु. शिंके; याच्यावर थंड करण्यासाठी पाणी ठेवले जाते.

**शिक्यावलम्बन**–न., शिक्यं तत्र जलाऽवलम्बनं शीतीकरणार्थम् इदं सप्तशीतीकरणानामेकतमम् (सुसू. ४५.१९)
शिंक्यावर ठेवलेले, शिंक्यावर पाण्याचा लोटा तोंडाला वस्त्र बांधून पाणी भरून उलटा बांधतात. पाणी गार होण्यासाठी पदार्थ थंड करण्यासाठी उपयोगात आणावयाच्या साधनांच्या ७ प्रकारांपैकी एक साधन.

**शिखण्डी**–स्त्री., वनस्पति० गुञ्जा (ध. ४.२९; पृ. ११०)
गुंज.
सुवर्णयूथा, यूथिकाभेदः द्र० 'यूथिका' (रा. १०.२५१, पृ. २००)
जुई, सोनजुई.

**शिखर**–न., वनस्पति० लवङ्गम् (ध. ३.४१; पृ. १०४)
लवंग.
भैषज्य० कर्कटशृङ्गी (रा. ६.१११; पृ. २२)
काकडशिंगी.

**(शिखरी)**–स्त्री., वनस्पति० वृक्षादनी (रा. ५.१४१; पृ. १५३)
बांडगूळ, बांदे.

**–दशन**–पु., लक्षण० शिखरवत् तीक्ष्णाग्रत्वेन शोभना दन्ता यस्य सः (चवि. ८.१०९)
शिखराप्रमाणे टोकदार असल्याने शोभिवंत असे दांत असणारा.

**शिखरिन्**–पु., वनस्पति० अपामार्गः (ध.१.२६०;पृ.६०)
अघाडा.
भैषज्य० कुन्दुरुः (ध. ३.१३१; पृ. १२१)
तीक्ष्ण वासाची एक वनस्पती.
वनस्पति० जूर्णा (रा. १६.१६७; पृ. २२९. अहृसू. ३०.२४)
जोंधळे.

**(शिखरिणी)**–स्त्री., वनस्पति० वनमल्लिका (ध. ५.१४०; पृ. १९८)
मोगरा. रानमोगरा.
आहारद्रव्य० 'शिकरण' इति लोके र. २७.९४-९६)
आहारद्रव्य, शिकरण.

**शिखा**–स्त्री., वनस्पति० बर्हिचूडा (रापरि. ५.१३; पृ. ३४१)
मोरशिखा नावाची वनस्पती.

**–कन्द**–न., वनस्पति० गृञ्जनम् (रा. ७.५५; पृ. १४१)
गाजर.

**–वला**–स्त्री., वनस्पति० बर्हिचूडा (रापरि. ५.१३; पृ. ३४१)
मोरशिखा नावाची वनस्पती.

**शिखालु**–स्त्री., वनस्पति० **बर्हिचूडा**
( रापरि. ५.१३;पृ. ३४१ )
मयूरशिखा.

**शिखिन्**–पु., पक्षि० **मयूरः** ( चसू. २७.५८ ) **अस्य पित्तस्य लेपात् श्वित्रं नश्यति** ( सुचि. ९.२६ )
मोर. याच्या पित्ताच्या लेपाने पांढरे कोड नष्ट होते.
**कुक्कुटः** ( ड. सुक. ५.६८-७३ ) कोंबडा.
**शिखायुक्तः यः स ब्राह्मणः** ( चशा. ८.५० )
शेंडी असलेला ब्राह्मण.
**शिखा ज्वाला; तद्वान् अग्निः** ( र. ३.८५ )
ज्वालायुक्त अग्नि.
खनिज० **तुत्थकम्** ( र. ११.५० ) मोरचूद.
वनस्पति० **चित्रकः** ( र. १३.७४-७५ ) चित्रक.
**शितिवारः** ( ध. १.१५५; पृ. ३६ ) शितिवार.
वि., **शिखायुक्तः**, **सशिखः** ( **ब्राह्मणादिः** )
( चशा. ८.५० ) शेंडी असणारा ( ब्राह्मण वगैरे ).

( **शिखिनी** )–स्त्री., वनस्पति० **बर्हिचूडा**
( रापरि. ५.१३; पृ. ३४१ )
मयूरशिखा, मोरशिखा.

( **शिखि** )–**कण्ठ**–न., खनिज० **तुत्थकम्**
(रा.१३.२०५; पृ. १२४. अहृसू. ७.१४ )
मोरचूद.

–**कर्णी**–स्त्री., वनस्पति० **त्रिपर्णी, अग्निकर्णी**
(र. २९.५७)
अग्निकर्णी, त्रिपर्णी.

–**चन्द्रक**–पु., वनस्पति० **असौ कर्णरोगे तैलनिर्माणविधावुपयुज्यते** ( असंउ. २२ )
एक वनस्पती. शिखिचन्द्रक. कर्ण रोगावरील तेल तयार करण्याच्या कामी उपयोगात आणले जाते.

–**तुत्थ**–न., **मयूरतुत्थम्** (र.१८.६९) द्र० 'तुत्थक'
मोरचूद.

–**त्र**–पु., **दग्धकाष्ठकठिनखण्डः** ( र. ७.५-१५ )
जळालेल्या लाकडाचा कठिण तुकडा.
**कोकिलः शिखिनमग्निं त्रायते निर्वापणादिति शिखिनः कोकिलः** ( र. २.१७० ) कोळसा.

–**निभ**–**अग्निवद् रक्तवर्णम्** ( र. २३.७५-७६ )
रक्तवर्ण.

–**नेत्र**–पु., वनस्पति० **बिल्वः** (रा.११.१३५; पृ. २७)
बिल्व.

–**पित्त**–न., **मयूरपित्तम्, श्वित्रे लेपार्थमुपयुज्यते** ( असंचि. २२ ) द्र० 'पित्त' मोराचे पित्त.
कोडावर लेप देण्याकरता उपयुक्त.

–**प्रिय**–पु., वनस्पति० **बदरभेदः** ( रा. ११.१६४ )
द्र० ' बदर ' बोराचा प्रकार.

–**बर्हविचित्रार्चिस्**–वि., **मयूरपिच्छानीव विचित्रवर्णान्यर्चींषि यस्य सः, अग्निः । यदा विषदुष्टमन्नमग्नौ प्रक्षिप्तं भवति तदा चाग्नेर्ज्वालाः शिखिबर्हं इव विचित्रवर्णा भवन्ति । धूमश्च कुणपगन्धिर्भवति** ( चचि. २३.१०८-१०९; सुक. १.२९ )
मोराच्या पिसाप्रमाणे निरनिराळ्या रंगाच्या ज्वाला येणारा अग्नि. विषयुक्त अन्न अग्नीवर टाकले असता मोराच्या पिसाप्रमाणे निरनिराळ्या रंगाच्या ज्वाळा येतात व धूर प्रेताच्या घाणीसारखा दुर्गंधी असतो.

–**मूल**–न., वनस्पति० **गृञ्जनम्** ( रा. ७.५५ ) गाजर.

–**मोदा**–स्त्री , वनस्पति० **अजमोदा** ( रा. ६.१५१ )
अजमोदा, ओवा.

–**वाडव**–पु., पारदादियोग० **पारदताम्राभ्रगन्धकादिसाधितोऽयं वातगुल्महरः** ( र. १८.५८-६१ )
सिद्धौषधाचे नाव. पारा, तांबे, अभ्रक, गंधक, इत्यादींनी युक्त. हा वातगुल्मनाशक आहे.

–**शिखा**–स्त्री., वनस्पति० **मेथिका** ( ध. ६.१११ )
मेथी.

**शिग्रु**–पु., वनस्पति० **शिम्बीवृक्षः** ( र. १८.३; अहृसू. ६.१०६ ) **शोभाञ्जनम्; विटपशाकम्,** (सुउ. ४२.९४) **हरितविशेषः, स च हृद्य आस्वादनीयः पित्तोत्क्लेशकरश्च** ( चसू. २७.१७० ) **नाडीस्वेदार्थमुपयुक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. १४.३१ ) **अस्य बीजं शीर्षविरेचने उपयुज्यते** ( चसू. २.३-५ ) **स्नेहयुक्तद्रव्यविशेषः** (चसू. १३.१०) **गुणाः–तिक्तः कटुरुष्णस्तीक्ष्णो रुच्यो दीपनः कफवातघ्नः शोफकृम्यामदोषविषमेदविद्रधिप्लीहागुल्ममुखजाड्यव्रणदोषहरः** ( ध. ४.३९; सुउ. ३९.२७२ )
हिं.—सुहाञ्जना.
**म.—शेवगा.**
गु.—सरगवो.
बं.—सजिने.
ता.—उल्कटन्.
शेवगा. हृदयाला हितावह, स्वादिष्ट, पित्तोत्क्लेशकर, नाडीस्वेदासाठी उपयोगात आणावयाचे एक द्रव्य. ह्याचे बी शिरोविरेचनासाठी वापरले जाते; स्नेहयुक्त द्रव्यविशेष. कडू, तिखट, उष्ण, तीक्ष्ण,

रुचकर, दीपन, कफवातनाशक, सूज, कृमि, आमदोष, विष, मेद, विद्रधि, प्लीहा, गुल्म, तोंडाचे जडत्व, आणि व्रणातील दोषनाशक आहे.

**–ज**–न., वनस्पति० **मरीचम्** ( ध. २.९० ) मिरे.

**–पत्रज**–न., शाकवि० गुणाः–**कटूष्णं रुच्यं दीपनं पाचनं पथ्यं वातकफापहं कृमिघ्नं च** ( रापरि. ७.७१ )
शेवग्याच्या पानांची भाजी. तिखट, उष्ण, रुचकर. दीपक, पाचक, पथ्यकर, वातकफनाशक, कृमिनाशक.

**–फल**–न., शिग्रोः फलम् ( सुचि. १८.२३ ) **पाण्डुरोगशमनार्थं सुखाम्बुना एतद् योजयेत्** ( सुउ. ४४.२६ )
शेवग्याची शेंग. पांडुरोगासाठी कोमट पाण्याबरोबर घेणे योग्य.

**–बीज**–न., वनस्पति० **सितमरीचम्** ( ध. २.९० ) द्र० ' **मरीच** ' पांढरी मिरी.

**शिग्रुक**–पु., वनस्पति० **शिग्रुः** ( ध. ४.३९; पृ. १४२ ) शेवगा.

**शिञ्चितिकाफल**–न., बदरभेदः, गुणाः–**कषायं स्वादु संग्राहि शीतं च** ( सुसू. ४६.१३९-१४० ) द्र० '**बदर**'
उत्तर प्रदेशात होणारे मुठीएवढे व अति गोड बोर. **गुण**— तुरट, गोड, मळ घट्ट करणारे व थंड.

**शिण्डाकी**–स्त्री., आसुत० गुणाः–**कालाम्ला चिरकालावस्थानादम्ला रोचनी लघुश्च** ( चसू. २७.२८५ )
शिण्डाकी– आसवप्रकार. **गुण**–चवदार व हलके.

**शित**–वि., **तीक्ष्णम्** ( रा. ६.३१; पृ. ७३ ) तीक्ष्ण.

**–क्षार**–न., खनिज० **श्वेतटङ्कणम्** (रा.६.३१; पृ.७३) द्र० '**टङ्कण**' पांढरा टाकणखार.

**–जाम्रक**–पु., वनस्पति० **आम्रभेदः** द्र० ' **राजाम्र** ' ( रा. ११.११; पृ. १७१ )
उच्च दर्जाचा एक आंबा.

**–पर्णी**–स्त्री., वनस्पति० **आटरूषः** (रा.४.२९;पृ. ११) अडुळसा.

**–वर**–पु., वनस्पति० **शितिवारः** ( रा. ४.२०६;पृ. ३६ )
कुरडू.

**शितावरी**–स्त्री., वनस्पति० **शितिवारः** ( रा. ४.२०६; पृ. ३६ )
कुरडू.

**शिति**–पु., **भूर्जपत्रम्** ( र. २१.२९-३० ) भूर्जपत्र.

**–कण्ठ**–न., खनिज० **तुत्थम्** (ध. ३.१४५; पृ. १२४) मोरचूद.

**–मूलक**–न., वनस्पति० **उशीरम्** ( रा. १२.२६; पृ. ९७ )
वाळा.

**–वर**–पु., वनस्पति० **शितिवारः** (ध. १.१५५; पृ. ३६) कुरडू.

**–वार**–पु., वनस्पति० गुणाः– **कषाय उष्णो, वृष्यो, ग्राही, त्रिदोषघ्नो, ज्वरदाहहरश्च** ( ध. १.१५५; पृ. ३६)
कुरडू नावाची वनस्पती. **गुण**— तुरट, उष्ण, मळ बांधणारी, त्रिदोषनाशक. शुक्रवर्धक, ज्वरदाहहारक.

**–वारक**–पु., वनस्पति० **शालिञ्चः** ( चक्र. चचि. २६.५६ )
एक वनस्पती.

**शिथिल**–वि., **पीडनाक्षमम्** ( सुसू. ७.१९) सैल.

**–बन्धन**–न., बस्तिनेत्रदोष० **अस्मिन् ' स्रवः ' दोषो भवति** ( चसि. ५.४-५ )
बस्तीच्या नळीचा दोष. यामुळे बस्तीतील द्रव्य गळते.

**शिथिलेन्द्रिय**–पु., लक्षण० **दुर्बलेन्द्रियः** ( चचि. १६.६ )
ज्याची इंद्रिये दुर्बल आहेत असा.

**शिप्रा**–स्त्री., **महिषी** ( र. १०.९६ ) म्हैस.
**मुक्ताशुक्तिः** ( र. १०.९६ ) मोत्याची शिंप.

**शिफा**–स्त्री., वनस्पति० **द्रवन्ती** ( रा.५. ३४७; पृ. ५५) उंदीरकानी.
**हरिद्रा** ( रा. ६.८१; पृ. १८ ) हळद.
**शतपुष्पा** ( ध. २.१; पृ. ६९ ) बडीशेप.
**मूलम्** ( र. २.७१-७३ )मुळा.
**शताह्वा** ( र. २३.४३-४४ ) बडीशेप.

**–रुह**–पु., वनस्पति० **वटः** (रा. ११.११४; पृ. १८४) वड.

**शिबिर**–पु., तृणधान्य० **स च कषायमधुरवातलशीतलघ्वादिगुणः** ( चसू. २७.१८)
वऱ्याच्या तांदळासारखे एक प्रकारचे तृणधान्य. कषाय, मधुर, वातल, शीत, लघु इ० गुण युक्त. विदेह देशात तीरभुक्त, सिद्धक अशी नावे आहेत.

**शिम्ब**–पु., शमीधान्य० गुणाः–**कषायो मधुरः विपाके कटुः रूक्षः विषशोषशुक्रबलासदृष्टिक्षयकृत्, विदाही, प्रभिन्नविण्मारुतपित्तलश्च** ( सुसू. ४६.४४-४५ ) शेंगाचे धान्य–तुरट, गोड, पचल्यावर तिखट, रूक्ष, विष–क्षय, शुक्र, कफ दृष्टि त्यांचा क्षय करणारी आहेत. घशाशी जळजळ करणारी, प्रामुख्याने मल-भेदक, वात– आणि पित्त वर्धन करणारे आहे.

**शिम्बिका**–स्त्री., वनस्पति० **मुद्गपर्णी** (र. ११.५३-५७) रानमूग.

( **शिम्बी** )–स्त्री., वनस्पति० **कपिकच्छूः** ( रा. ३.२०१;पृ. ३५ ) खाजकुहिली.

**मुद्गपर्णी** ( ध. १.१३८; पृ. ३२ ) रानमूग.

**विविधशिम्बिजातिः**, गुणाः–**अवृष्याऽचक्षुष्या विष्टभ्य पच्यमाना, रूक्षा, कषाया, कोष्ठे वातप्रकोपिनी च** ( चसू. २७.३२ ) शेंगातून निर्माण होणारे अनेक प्रकारचे धान्य. उदाहरणार्थ पावटे, वाल हे शुक्राला, डोळ्याला हितकारक नाहीत. तसेच ते रुक्ष, तुरट आणि कोठ्यामध्ये वात वाढवून पचविणारे आहेत.

**शिम्बि**–स्त्री., **एरकातृणम्, मुद्गादिशिम्बीमूलम्** ( र. २३.४१-४२ ) मूग इ० शेंगांच्या वेलींचे मूळ.

**शिम्बी**–स्त्री., ( अहसू. ६.१७ ) शेंग.

**–धान्य**–न., धान्य० गुणाः– **वैदलं मधुरं कषायकटुपाकि हिमं रूक्षं वातलं कफपित्तबद्धमूत्रमलं मुद्गमसूराभ्याम् ऋतेऽऽध्मानकारि च** ( अहसू. ६.१७ ) शेंगेत येणारे द्विदल धान्य. मधुर, कषाय, कटुपाकी, थंड, रूक्ष, वातकर, कफ-पित्त-मल-मूत्र बद्ध करणारे आहे. मूग-मसुरांशिवाय इतर सर्व द्विदल धान्ये आध्मान करणारी आहेत.

**–फल**–न., वनस्पति० **आहुल्यम्** ( रापरि. ४.३३; पृ. ३३७ ) तरवड ( तरोटा ).

**शिरसःपरिपूर्णत्व**–न., **शिरोगौरवम्** ( सुउ. ४१.१३ ) डोक्याला जडत्व वाटणे.

**शिरस्**–न., शारीर० **मस्तकम्** ( चवि. ८.११७; सुउ. १८.४८-४९ ) **चक्षुरादिप्रधानेन्द्रियाणामाऽऽश्रयः** (सुशा. ३.३२) **षडङ्गेष्वेकम्** (सुशा. ५.३) द्र० ' **शरीरप्रमाण** ' डोळे, कान वगैरे प्रधान इंद्रियांचे आश्रयस्थान. सहा अंगांपैकी एक.

**–ताप**–पु., शिरोरोग० **षड्विधोऽयम्–तत्र वातजलक्षणानि–शङ्खनिस्तोदः, घाटायाः संभेदनं, भ्रुवोर्मध्यस्य ललाटस्य च पतनवद् वेदना, स्वनतः श्रोत्रबाधाऽक्ष्णोराकर्षणम्, शिरसो घूर्णनं सन्धिमोक्षवच्च, सिराजालस्य स्फुरणं, कन्धराया हन्वोश्च स्तब्धत्वं प्रकाशाऽसहत्वं घ्राणस्रावोऽकारणेनैव व्यथा च शमश्च, शङ्खनिस्तोदाऽऽदिकस्य मर्दनस्नेहस्वेदबन्धैश्च मार्दवं जायते, पित्तजलक्षणानि–ज्वरः, शिरोधूमायनं स्वेदनमक्षिदहनं मूर्च्छा रात्रौ तथा शीतोपचारैश्च मार्दवं भवति, कफजलक्षणानि–अरुचिः, शिरसो गुरुता, स्तिमितता शीतता चालस्यं सिराणां निःस्पन्दता दिवा पीडा मन्दा भवति निशि गाढतरा जायते, रक्तजलक्षणानि–रक्तजशिरस्तापः पित्तजशिरस्तापाधिकरुजो भवति, संनिपातजलक्षणानि–संनिपातजशिरस्तापो वातादिसर्वलक्षणयुक्तो भवति, कृमिजलक्षणानि–संकीर्णैराहारैः शिरसि क्लेदिते रुधिरे मांसे च संनिपाते च कोपिते कृमयो मूर्ध्नि जायन्ते। ते च मूर्ध्नो रक्तं पिबन्तः घोरा वेदनाः कुर्वन्ति। ताश्च वेदना मनोविभ्रंशकारिण्यो भवन्ति** ( असंउ. २७ ) द्र० **'शिरोरोग'** डोके दुखणे हे सहा प्रकारचे आहे. ( १ ) वातज (२) पित्तज (३) कफज (४) रक्तज (६) त्रिदोषात्मक (६) कृमिज. **वातज शिरोरोगामध्ये** शंखाचे स्थानी दुखावा. अवटु ( घाटा ) या मानेच्या भागाला फोडल्याप्रमाणे पीडा होते. भुवयांचे मध्ये व कपाळाला पडल्याप्रमाणे वेदना, आवाजाने कानाला त्रास होतो. सांधा निखळल्यासारखी वेदना, डोळे व डोके फिरते आहे असे वाटते. सिराच्या जाळ्यांचे स्फुरण, खांदे आणि हनुवटी जखडल्यासारखी होते. प्रकाश सहन होत नाही. नाकातून स्राव व वेदना अकारण होतात. सर्व एकाएकी थांबते. ही सर्व चिन्हे मर्दन-स्नेहन-स्वेदन बंधनाने कमी होतात.

**पित्तज शिरोरोगाची लक्षणे**—ज्वर, डोक्यातून धूर निघाल्या सारखे वाटते, घाम येतो. डोळ्यांची आग होते, रात्री मूर्च्छा असते, शीतोपचाराने बरे वाटते.

**कफज शिरोरोगाची लक्षणे**—रुचि नसणे, डोके जड असणे, जखडल्यासारखे वाटणे, थंडावा, आळस, शिरांचे स्पंदन न होणे, दिवसा वेदना

मंद होतात, रात्री फार वाढतात. **रक्तज शिरोरोगाची लक्षणे**—पित्तज शिरोरोगापेक्षा अधिक तीव्र पीडा व लक्षणे होतात. **संनिपातज शिरोरोगाची लक्षणे**—वातादी सर्व शिरोरोगांच्या लक्षणांनी हा युक्त असतो. **कृमिज शिरोरोगामध्ये**—परस्पर विरुद्ध आहाराने डोक्यामधील रक्त व मांस अधिक द्रव व ओलसर होते. तिन्ही दोषांचा प्रकोप होतो, कृमि होतात; ते डोक्यातील रक्त पीत असता घोर अशा वेदना होतात. त्या वेदना मन अस्वस्थ करतात.

**–तालु**–न., **शिरसः तालु** ( चशा. ८.४३ )
डोक्याची टाळू.

**–त्राण**–न., **शिरोभूषणम्, शिरोरक्षणार्थमाभरणम्** ( सुक. १.५९ )
डोक्याच्या संरक्षणासाठी वापरावयाचे पगडी, टोपी, फेटा, कोशा इत्यादी.

**( शिरः )–कपाल**–न., **अस्थि॰ शिरः कपालास्थि** ( चशा. ७.६ )
डोक्याची कवटी, डोक्याच्या कवटीची हाडे.

**–कम्प**–पु., **लक्षण॰ शिरसः कम्पः वातो रूक्षादिभिः क्रुद्धः शिरःकम्पमुदीरयेत्** ( चसि. ९.८६; असंउ. २७; र. २४.७४ )
डोके कापणे, मानेचा भाग हलत राहाणे; वात रूक्ष इत्यादी गुणांनी कुपित होऊन डोक्याचा कंप निर्माण करतो.

**–शूल**–न., पु., **लक्षण॰** ( चसू. ५.५९; चसू. ७.८ )
डोकेदुखी. डोक्यातला शूल.

**–शूलघ्न**–वि., **शिरसः शूलं पीडाविशेषं हन्तीति शिरःशूलघ्नम्, मूर्धविरेचनम्** ( सुउ. ३९.१२९ )
डोकेदुखीनाशक औषध, शिरोविरेचन.

**–स्तम्भ**–पु., **लक्षण॰ शिरसः स्तम्भः** (चसि. २.२२)
डोके जखडणे.

**–स्नेह**–पु., **शिरसि स्नेहावचारणं सामान्यवातोपक्रमेषु एक उपक्रमः** ( सुचि. ४.२२ )
डोक्याला तेल–तूप यासारखा स्नेह लावणे, मर्दन करणे. सामान्य उपचारांपैकी वाताचा एक उपचार.

**( शिरश् ) छेदन**–न., **शीर्षच्छेदः, यस्य शिरसि स्वप्ने कण्टकिनी लता जायते स शिरोरोगेण वा शिरश्छेदनेन हन्यते** (असंशा. १२.१४)
स्वप्नात जे डोक्यात काटेयुक्त वेल निर्माण झालेली पाहतात ते शिरोरोगाने किंवा शिरच्छेद होऊन मरतात.

**(शिरो) गौरव**–न., **लक्षण॰ शिरसो गुरुत्वम्, शिरोजाड्यम्** ( चसू. २.६ ) डोके जड होणे.

**–गौरवघ्न**–वि., **शिरसो जाड्यं नाशयतीति ( मूर्धविरेचनम् )** ( सुउ. ३९.१२९ )
डोक्याचा जडपणा नाहीसे करणारे औषध. ( शिरोविरेचन )

**–ग्रह**–., पु., **लक्षण॰ शिरसो गृह्यमाणत्ववद् वेदना** ( सुउ. ३९.४९ )
डोके जखडणे, डोके धरल्यासारखी वेदना.

**–ग्राहिन्**–वि., **लक्षण॰ शिरोग्रहणवद् वेदनया युक्तः** ( चचि. ३.७१ )
डोके जखडल्याप्रमाणे वेदना असणारा.

**–ग्रीव**–न., **शिरश्च ग्रीवा च शिरोग्रीवम्** (चशा.७.५)
मान आणि डोके.

**–धरा**–स्त्री., **शारीर॰ मन्या** ( चवि.८.११७ )
मान, गळा.
**ग्रीवा** ( सुशा. ७.२२; असंशा. ८.३२ ) मान.

**–न्यास**–पु., **शिरसः पार्श्वतो गमनम्** ( चचि. २३.२२९ )
मानेच्या एका बाजूला डोके झुकणे.

**–बस्ति**–पु., **उपक्रम॰ शिरसि प्रभूततैलधारणस्वरूपः तस्य विधिस्तु–शुद्धाक्तस्विन्नदेहस्य जानुसमे मृदुनि पीठे उपविष्टस्य पुरुषस्य सायाह्ने द्वादशाङ्गुलविस्तीर्णं गव्यं माहिषं वा चर्मपट्टं शिरःसममाकर्णबन्धनस्थानं बध्नीयात् । तस्योपरि वस्त्रमाऽऽवेष्ट्य चैलवेणिकया बद्ध्वा माषकल्केन तत्स्थानं लेपयेत् । ततश्च यथाव्याधि शृतं स्नेहं कोष्णं कृत्वा शिरसः उपरि निषेचयेत् । तच्च निषेचनं स्नेहस्य केशभुव ऊर्ध्वमङ्गुलिप्रमाणं यावत् कर्तव्यम् । स च स्नेहः यावत् वक्त्रनासिकास्रुतिः स्यात् तावत् विधार्यः** ( अहसू. २२.२७-३० ) **शिरोरोगे नेत्ररोगेषु च अयमुपयुज्यते** ( सुउ. ९.५ ) **दन्तहर्षविकारे च हितकरः** ( सुचि. २२.३६; अहसू. २२.२६ )
चिकित्सेचा एक प्रकार. डोक्यावर भरपूर तेल धारण करण्याचा विधि.

**पद्धति**–वमन, विरचन, स्नेह, स्वेद करवून गुडघ्याइतक्या उंच व मऊ आसनावर संध्याकाळी रोग्याला बसवावे. नंतर गाईच्या किंवा म्हशीच्या कातड्याचा बारा इंच रुंद डोक्याच्या आकाराचा पट्टा घेऊन कानापर्यंत गुंडाळून तेथेच गाठ द्यावी

त्याच्यावर एक वस्त्र उडदाच्या पिठाचा दोन्ही बाजूनी लेप देऊन सुतळीने बांधावे. नंतर रोगाचा व दोषदूष्याचा विचार करून तयार केलेले तेल कोमट करून डोक्यावर घालावे. डोक्यावरील केसांच्या वर एक अंगुळ उंचीपर्यंत ते तेल भरावे. नाकातून कफस्राव होऊ लागे तो ते तेल धारण करावे. या विधीमुळे शिरोरोग, नेत्ररोग, आणि दात शिवशिवण्याचा दंतहर्ष नावाचा विकार नष्ट होतो.

**–बस्तिकोश**–पु., बस्त्यर्थं शिरस उपरितनो भागो यः पट्टचेलिकामाषचूर्णादिभिः सम्यग्बध्यते
( सुउ. १८.४९-५० )
शिरोबस्तीसाठी डोक्याभोवती पट्टा वगैरे गुंडाळून स्नेह भरण्यासाठी तयार केलेली पोकळी.

**–बस्तिविधि**–पु., शिरसश्चर्मपट्टेन परितो बद्ध्वा बहुतैलेन शिरसि तैलादिपूरणम्
( अहसू. २२.२७-३०; असंसू. ३१.१९ )
द्र० ' शिरोबस्ति '
शिरोबस्तीचा विधी. पहा 'शिरोबस्ति.'

**–भेद**–पु., रोगलक्षण० शिरोविदारणमिव वेदना, विसूचिकालक्षणेष्वेकं लक्षणम् ( सुउ. ५६.६ )
डोके फुटत आहेशी वेदना. विसूचिकाविकारातील एक चिन्ह.

**–भ्रम**–पु., लक्षण० चक्रस्थितिवत् शिरसि भ्रमः ( चचि. २२.१२ )
चाकावर बसून गोल गोल फिरल्यासारखे वाटणे.

**–भ्रमण**–न., लक्षण० शिरोभ्रमः, शिरसि भ्रमः ( र. २१.१८६-८७ )
भ्रम, चक्कर.

**–रुज्**–स्त्री., लक्षण० ( चसू. १३.१६ ) शिरसो रुक्, तोदनम्, पीडा ( चसू. २०.११; सुउ. ३९.३०; असंसू. २०.१३ )
डोक्यामध्ये दुखणे, टोचणी, पीडा.

**–रुजा**–स्त्री., शिरोरोगः, शिरोरुक् ( चसू. ३.२३; चसू. ७.६ )
डोकेदुखी, डोक्याचा रोग.

**–रुह**–पु., केशः ( चचि. २६.१३२; सुक. १.२२; असंसू. ३.७३ )
केस.

**–रेक**–पु., उपक्रम० शिरोविरेचनत्वेनोपयोज्यं नस्यम् ( अहसू. १४.५; असंसू. २४.७ )
नस्य, डोक्याचे रेचक नस्य.

**–रोग**० पु., रोग० शिरसि जायमानो व्याधिः । प्राणभृतां प्राणाः, सर्वेन्द्रियाणि च यत्र श्रिताः तदङ्गानामुत्तमाऽङ्गं शिर इत्यभिधीयते । संग्रहः–अर्धावभेदको वा स्यात् सर्वं वा रुज्यते शिरः । प्रतिश्यामुखनासाक्षिकर्णरोगशिरोभ्रमाः अर्दितं, शिरसः कम्पो गलमन्याहनूनां ग्रहः विविधाश्चापरे वातादिक्रिमिसंभवा रोगाः भवन्ति ( चसू. १७.१३ ) स च वातपित्तकफसन्निपातक्रिमिभेदात् पञ्चविधः, तत्र वातजे शिरोरोगे वृद्धो वायुः शिरोगताः सिरा आविश्य कुप्यति । ततस्तस्य महच्छूलं जायते । शङ्खौ निस्तुद्येते, घाटा संभिद्यते, सभ्रूमध्यं ललाटं चाऽतिवेदनमिव तपति, स्वनतः श्रोत्रे वध्येते, अक्षिणी निष्क्रिष्येते, शिरो घूर्णति, सिराजालमतिस्फुरति शिरोधरा स्तभ्यते, स्निग्धोष्णं चोपशेते, (चसू. १७.१८-२१) पित्तजलक्षणम्–कट्वम्ललवणक्षारमद्यक्रोधाऽऽतपाऽनलैः शिरसि संदुष्टं पित्तं शिरोरोगाय कल्पते । तेन शिरो दह्यते, सज्यते, शीतं सुषूयते, नाम शीतमिच्छति चक्षुषी दह्येते, तृष्णा भ्रमः स्वेदश्च जायते ( चसू. १७.२२-२३ ) कफजलक्षणम्–स्वप्नसुखैर्गुरुस्निग्धातिभोजनैरास्यासुखैः शिरसि संदुष्टः श्लेष्मा शिरोरोगाय कल्पते । तेन शिरो मन्दरुजं सुप्तं स्तिमितभारिकं च भवति ।
तथाऽऽलस्यमरोचकस्तन्द्रा उत्पद्यते । त्रिदोषजे शिरोरोगे वाताच्छूलं भ्रमः कम्पः, पित्ताद्दाहो मदस्तृषा, कफाद्गुरुत्वं तन्द्रा च जायते
( चसू. १७.२४ ) क्रिमिजलक्षणम्–तिलक्षीरगुडाजीर्णपूतिसंकीर्णभोजनाद्दोषलस्याऽसृक्कफमांसानां क्लेद उपजायते ततः शिरसि संक्लेदात् पापकर्मणः पुरुषस्य जाताः क्रिमयो जनयन्ति शिरोरोगम्; किं च रुजाकण्डूशोफदौर्गन्ध्यदुःखितं क्रिमिरोगाऽऽतुरं विद्यात्, क्रिमीणां दर्शनेन च क्रिमिरोगाऽऽतुरं विद्यात् ( चसू. १७.२७-२९ ) सान्निपातिकलक्षणम्–शिरोऽभितापे दोषत्रयप्रवृत्ते सर्वाणि लिङ्गानि समुद्भवन्ति । रक्तजलक्षणम्–रक्ताऽऽत्मकः पित्तसमानलिङ्गः तत्र शिरसः स्पर्शासहत्वं भवेत् । क्षयजः शिरोरोगः–शिरोगतानामसृग्वसाश्लेष्मसमीरणानां संक्षयेण अस्य प्रादुर्भावः भवति सस्वेदनच्छर्दनधूमनस्यैः कफक्षयः, नागरादितीव्रधूमेन

**वसामस्तिष्कादिक्षयः, सिरामोक्षाऽऽदिभिरसृक्क्षयः अत एवैतैः संस्वेदनादिभिः क्षयजस्य रोगवृद्धिः** ( मा. शिरोरोगनि. ४.६ ) **नवशिरोरोगसामान्यचिकित्सा–मध्वादियुक्तैः शिरोविरेचनद्रव्यैः शिरोविरेकः। ततः सर्षपतैलेन नस्यम्। अशान्तेषु शिरोरोगेषु स्नेहस्वेदान् कृत्वाऽनन्तरं सिराणां मोक्षणं कर्तव्यम्** ( सुउ. २६.४२-४४ )

द्र० **'शिरस्ताप'**

शिरोरोग. शरिरांतर्गत प्राण, सर्व इंद्रिये ही ज्याच्या आश्रयाला आहेत असे सर्वांगात जे श्रेष्ठ अंग त्याला शिर असे म्हणतात. शिराला होणारे रोग ते शिरोरोग. अर्धे अथवा संपूर्ण डोके दुखणे, पडसे, मुखरोग, नासारोग, अक्षिरोग, कर्णरोग, शिरोभ्रम, अर्दित, शिरःकंप, गळा–मान–हनुवटी जखडणे इ० डोक्याचे विकार. वाताने, पित्ताने, कफाने, सन्निपाताने, कृमीने होणारे असे पाच प्रकार होत. **वातज शिरोरोगात** वाढलेला वायु शिरामधील रक्तवाहिन्यांमध्ये आघात करतो. त्यामुळे तेथे फार ठणका असतो. शंखामध्ये टोचल्यासारखी पीडा होते, मानेचा काटा फुटल्याप्रमाणे वाटतो, भुवयांचा मध्यभाग व कपाळ यामध्ये अती वेदना होतात, डोके तापते, आवाजाने कानठळ्या बसतात, डोळ्यांना बाहेर खेचले जात आहे अशी ओढ लागते, डोके सारखे हालते, शिरांच्या जाळ्यात अति स्फुरण होते, मान जखडते, स्निग्ध आणि उष्णाने बरे वाटते. **पित्तज रोगात** तिखट, आंबट, लवण क्षार, मद्य, क्रोध, उन्ह, शेक इ० कारणांनी प्रकुपित पित्त डोक्याचा दाह, ठणका उत्पन्न करते. गार पदार्थ डोक्यावर ठेवला तर तो सहन होतो, डोळे जळजळतात. तहान, भ्रम आणि घाम ही उत्पन्न होतात. **कफज रोगात**—गुरु, स्निग्ध, अति भोजन, अती झोप इत्यादी कारणांनी प्रकुपित झालेला कफ डोक्यात जडत्व, बाधिर्य, थोडी थोडी पीडा, आळस, अरोचक, झापड उत्पन्न करतो.

**सांनिपातिक लक्षणे**—तीनही दोषांची लक्षणे होतात.

**रक्तज शिरोरोगलक्षणे**—पित्ताप्रमाणेच सर्व चिन्हे होतात व स्पर्श सहन होत नाही. **क्षयज शिरोरोग**— डोक्यातील रक्त, वसा, कफ आणि वात यांचा क्षय होऊन हा विकार होतो. पीडा अतिशय असल्याने हा असह्य होतो. शेकणे, ओकारी, धूम्रपान, नस्य यांनी तो वाढतो. नवीन शिरोरोगाची सामान्य चिकित्सा— देवडांगरी इ. शिरोविरेचन करणाऱ्या द्रव्यांचे मधाबरोबर नस्य द्यावे. नंतर मोहरीच्या तेलाचे नस्य द्यावे. याने बरे न वाटल्यास स्नेह, स्वेदन करून शिरावेधविधीने रक्त काढावे.

**सूर्यावर्तादिः रोग०** ( र. १२.१-८ )

सूर्योदयाबरोबर डोके दुखण्यास सुरवात होऊन सूर्य जसजसा वर येतो तसतसे ते दुखणे १२ वाजेपर्यंत वाढते नंतर कमी होत जाऊन सूर्यास्ताला थांबते, तो रोग.

**–रोगप्रतिषेध**–पु., अध्यायसंज्ञा० ( सुउ. २६.१ )
या नावाचा अध्याय. यात डोक्याच्या रोगांचे उपचार आहेत.

**–रोगविज्ञानीय**–वि., अध्यायसंज्ञा० **शिरोरोगविज्ञानमधिकृत्य कृतः** ( सुउ. २५.१ )
या नावाचा अध्याय. यात डोक्याच्या रोगांची माहिती आहे.

**–रोगारि**–पु., ( परिव० ) **पारदादियोग० पारदाऽभ्रकतीक्ष्णलोहकान्तताम्राणां भस्मानि स्नुहीक्षीरैः संमर्द्य तेषां पिण्डानि कुर्यात्। मात्रा–माषमात्रम्। फलम्–सूर्याऽऽवर्तादिशिरोरोगविनाशः** ( र. २४.९२ )
सिद्धौषधाचे नाव. पारा, अभ्रक, पोलाद, चुंबकलोह, तांबे, यांची भस्मे त्रिधारी निवडुंगाच्या चिकामध्ये घोटून त्याच्या गोळ्या कराव्या. सूर्यावर्त वगैरे शिरोरोगांवर उपयोगी आहे. प्रमाण १ मासा.

**–विरेक**–पु., **नस्यम्** ( ड. सुउ. ६४.३८-३९ )
डोक्याचे रेचक. नाकात घालावयाचे औषध.

**–विरेचनद्रव्य**–न., **नस्यद्रव्याणि, एतानि तानि अपामार्गपिप्पलीमरिचविडङ्गशिग्रुशिरीषतुम्बुरुपिल्वजाज्यजमोदावार्ताकीपृथ्वीकैलाहरेणुकाफलानि च, सुमुखसुरसकुठेरकगण्डीरकालमालकपर्णासक्षवकफणिज्झकहरिद्राशृङ्गवेरमूलकलशुनतर्कारीसर्षपपत्राणि च, अर्कोऽलर्ककुष्ठनागदन्तीवचाऽपामार्गश्वेताज्योतिष्मतीगवाक्षीगण्डीरपुष्प्यवाक्पुष्पीवृश्चिकालीवयस्थातिविषामूलानि च, हरिद्राशृङ्गवेरमूलकलशुनकन्दाश्च, लोध्रमदनसप्तपर्णनिम्बार्कपुष्पाणि च, देवदार्वगुरुसरलशल्लकीजिङ्गिन्यसनहिङ्गुनिर्यासाश्च, तेजोवतीवराङ्गेङ्गुदीशोभाञ्जनबृहतीकण्टकारिकात्वचश्चेति** ( चवि. ८.१५१ )

नस्यासाठी उपयोगी पडणारी द्रव्ये. आघाडा, पिंपळी, मिरी, वावडिंग, शेवगा, शिरीष, रान–कोथिंबीर, पिलु, ओवा, अजमोदा, रिंगणी, बाफळी, वेलदोडा, रेणुकबीज यांची फळे; मोहरी, तुळस, अजवला, तिखट सुरण, काळा अजवला, अजवला–प्रकार, नाकशिंकणी, मरवा, हळद, आले, मुळा, लसूण, ऐरण, मोहरी यांची पाने; व रुई, मांदार, कोष्ठ, सूर्यकमळ, वेखंड, आघाडा, मालकांगोणी, घोडे वृंदावन, तिखट सुरण, मेढशिंगी, ब्राह्मी, अतिविषा यांची मुळे; तसेच हळद, आले, मुळा, लसुण हे कंद. लोध्र, गेळफळ, सप्तपर्ण, निंब, रुई यांची फुले; देवदार, अगरू, सरळ वृक्ष, साळई, काळी सावर, असाणा, हिंगु यांचा चीक ( डिंक ), हिंगणबेट, मालकांगोणी, दालचिनी ( गुडत्वक्–वरांग ), शेवगा, डोरली, रिंगणी यांची साल.

**–विरेचनविकल्प**–पु., उपक्रम० **शिरोविरेचनभेद** ( सुचि. ४०.२१ )
नस्याचे प्रकार.

**–विरेचनोपग**–वि., **शिरोविरेचनोपयोगी; महाकषायवर्गे एको वर्गः, तत्र शिरोविरेचनोपगानि द्रव्याणि- ज्योतिष्मतीक्षवकमरिचपिप्पलीविडङ्गशिग्रुसर्षपाऽपामार्गतण्डुलश्वेतामहाश्वेता इति दशेमानि शिरोविरेचनोपगानि भवन्ति** ( चसू. ४.१३ )
शिरोविरेचनाला उपयोगी द्रव्ये. महाकषायवर्गापैकी एक. मालकांगोणी, नाकशिंकणी, मिरी, पिंपळी, वावडिंग, शेवगा, मोहरी, आघाडा बी, गोकर्णी, मोठी गोकर्णी ही दहा शिरोविरेचनोपयोगी द्रव्ये आहेत.

**–वृत्त**–न., वनस्पति० **मरिचम्** ( ध. २.८८; पृ.८७)
मिरी.

**–हुण्डन**–न., लक्षण० **केशभूमिस्फुटनं, शङ्खललाटभेदश्च,** ( चचि. २८.२२ )
त्वचा फुटणे, आख व कपाळ फुटणे, शंख ललाट ( कपाळ ) या ठिकाणी भेद झाल्याप्रमाणे पीडा होणे.

**शिरोभिघात**–पु., रोग० **शिरसि अभिघातः शिरस्याभिहते गण्डस्पन्दनजृम्भणादिलक्षणानि भवन्ति** ( चसि. ९.६ )
डोक्यावर आघात होणे. डोक्यावर आघात झाला असता गालांचे ठिकाणी फुरफुरणे, जांभया येणे इत्यादी लक्षणे होतात.

**शिरोऽभिताप**–पु., रोग० शिरोरोगः ( चनि. ३.११ ) **शिरः प्रतप्यते, शिरोऽभितप्यते येन सः** ( सुसू. १४.२०; असंउ. २ )
शिरोरोग. ज्यात डोके तापते असा शिरोविकार.

**शिरोभ्यङ्ग**–पु., **शिरसोऽभ्यङ्गः, स च सर्वशिरोरोगशमनः, केशानां मृदुत्वदीर्घत्वबहुत्वस्निग्धत्वकृष्णत्वादिकरः, मुखप्रसादनः, इन्द्रियतर्पणश्च** ( सुचि. २४.२५-२६ )
डोक्याला तेल लावणे. अभ्यंग. सर्व शिरोरोगांचे शमन करणारा, केसांना मऊपणा, लांबसडक केस होणे, केस भरपूर येणे, तुळतुळीत होणे, काळे भोर होणे, इत्यादी फायदे होतात व चेहरा प्रसन्न होऊन इंद्रियांची तृप्ति होते.

**शिरापत्र**–पु., वनस्पति० **हिन्तालः** ( रा. ९.९८; पृ.१८२ )
शिंदी.

**शिरालपत्रक**–पु., वनस्पति० **श्रीतालः** ( रा. ९.९५; पृ. १८२ )
मोठ्या पानांचा ताड. याच ताडाचे पानांना पूर्वी ताडपत्री म्हणत असत.

**शिरिवारिका**–स्त्री., वनस्पति० **चाङ्गेरीशाकम्, तच्च गुल्मोदावर्तशूलेषु प्रयोज्यम्** ( काखिल. १८.२३ )
आंबट चुका. गुल्म, वायु, ऊर्ध्व व शूळ यांवर उपयुक्त.

**शिरीष**–पु., वनस्पति० **गुणाः– तिक्तः, कटुरुष्णो (शीतः)** (रा.) **लघुर्वर्ण्यस्त्रिदोषघ्नो वातविषकुष्ठकण्डूत्वग्दोषश्वासकासपामाऽसृग्विनाशनः** (ध.५.११२;पृ.१९२) **शिरीषपुष्पं विषघ्नानां श्रेष्ठम्** ( चसू. २५.४०; सुक. ५.१७-१८ ) **विशेषतो शिरोविरेचनार्थमस्य फलं ग्राह्यम्** ( सुसू. ३९.६; र. २५.११० ) **अस्य पञ्चाङ्गानि विषहराणि** (असंउ.४०; अहसू.१०.३१)
हिं.—शिरीष.
**म.—शिरसी.**
गु.—सरसिडियो.
बं.—शिरीषगाछ.
ता.—चिरीटं.
शिरीष—शिरसी. गुण—विषनाशक. उष्ण, कडू, तिखट, लघु, वर्ण चांगला करणारा, त्रिदोषनाशक.

वात, विष, कुष्ट, कंडू, त्वचादोष, श्वास, कास, खरूज, रक्तदोषनाशक. विशेषतः याचे फळ डोक्याचे रेचक होय. याचे पंचांग विषहर श्रेष्ठ औषध आहे.

**-तैल**-न., योग० योनिरोगेषूत्तरबस्त्यादिषूपयुज्यते (असंउ. ३९)
शिरीषाचे तेल. योनी रोगामध्ये उत्तरबस्तिकरिता उपयोगात आणतात.

**-पत्रा**-स्त्री., वनस्पति० श्वेता (रापरि. ९.३८; पृ. ३६७)
शिरीषाच्या पानासारखी पाने असलेली वनस्पती.

**-बीज**-न., भैषज्य० शीर्षविरेचने उपयुज्यते (चसू. २.५)
शिरीषबीज, शिरोविरेचनात उपयोगी.

**शिलगर्भजा**-स्त्री., वनस्पति० पाषाणभेदः (रा. ५.२०९; पृ. ३७)
पाषाणभेद.

**शिलज**-न., खनिज० शैलेयम् (रा. १२.१३०; पृ. ११)
दगडफूल.

**( शिलजा )**-स्त्री., खनिज० शिलावल्का (रा. ५.२१३; पृ. ३७)
शिला, एक प्रकारचा दगड.

**शिला**-स्त्री., खनिज० अश्मादिकृतपिण्डिका (चसू. १४.४७)
चपटा दगड.
खनिज० मनःशिला (ध. ३.९६; पृ. ११५)
मनशीळ.
निर्यास० कर्पूरः (रा. १२.५६; पृ. १०१. र. ३.१; सुचि. २५.३८; असंसू. २१.४)
कापूर.

**-ज**-न., खनिज० शिलाजतु (सुचि. ७.११; र. २.११४-१५)
शिलाजित.

**-जतु**-न., शिलानिःसृतगिरिजधातु० (सुचि. १३.४-५)
तस्योत्पत्तिः- रजतात् हेम्नस्ताम्रात् कृष्णायसादपि चतुर्भ्यो धातुभ्यस्तस्य संभवः (चचि. १(३).४८) शिलाजतुजातिः-हेमाद्याः सूर्यसंतप्ता जत्वाभं मृदु मृत्स्नाऽच्छं यन्मलं स्रवन्ति तच्छिलाजतु। स सुवर्णस्य निस्रवो मधुरः सतिक्तो जपापुष्पनिभश्च विपाके कटुः शीतश्च। रूप्यस्य कटुकः श्वेतः शीतः स्वादुर्विपच्यते। ताम्रस्य बर्हिकण्ठाभस्तिक्तोष्णः कटुः पच्यते। यस्तु गुग्गुलुकाभासो लवणान्वितस्तिक्तकः विपाके कटुः शीतः सर्वश्रेष्ठश्च स चाऽयसः। सर्वे गोमूत्रगन्धयो यौगिकाः सर्वकर्मसु रसायनप्रयोगेषु पश्चिमस्तु विशिष्यते। (चचि. १(३).५५-६१) तस्य प्राधान्यम्- त्रपुसीसताम्ररूप्यसुवर्णलोहजानि षट् (सुचि. १३.७-८) षट्प्रकारेषु यत् कृष्णमलघु स्निग्धं निःशर्करं गोमूत्रगन्धि च तत् प्रधानम् (सुचि.१३.९-१०) रसः-शिलाजतुरसे कषायमतम्लं पाके नात्युष्णशीतं च (चचि. १(३).४९) गुणाः-तद्विधिभिः रसायनं वृष्यं रोगनुत् वातपित्तकफघ्नैर्निर्यूहैः सुभावितं सर्वैरेकैकशोऽपि परं वीर्योत्कर्षं करोति (चचि. १(३).५०) तस्य शुद्धिः-वह्नौ क्षिप्तं यत् लिङ्गाऽऽकारमधूमकं सलिले विलीनं शुद्धं च तत् शिलाजतु (र. २.११६) ऊषकादिगणे एकं द्रव्यम् (सुसू. ३८.३७)
हिं.—शिलाजीत.
**म.—शिलाजित.**
बं.—शिलाजित.
ता.—कल्मतं.

**सुवर्णापासून** स्रवणारा मधुर, किंचित कडवट, जास्वंदीच्या फुलाच्या रंगाचा, पचनानंतर तिखट, व थंड असतो. **रूप्यापासून** स्रवणारा— तिखट, पांढरा, थंड, मधुर विपाकी असतो. **तांब्यापासून** स्रवणारा— मोराच्या कंठाच्या रंगाचा, कडवट, उष्ण, व पचल्यावर तिखट असतो. **लोहापासून** स्रवणारा— गुग्गुळाच्या रंगाचा, किंचित खारट, कडवट, पचल्यावर तिखट व थंड असून सर्वश्रेष्ठ होय. सर्व प्रकारचे शिलाजित गोमूत्रासारख्या वासाचे, सर्व औषधियोगात वापरतात. लोहापासून स्रवणारा रसायन प्रयोगात विशेष उपयोगी. **प्राधान्य**— कथील, शिसे, ताम्र, रुपे, सुवर्ण व लोह यांपासून हा ६ प्रकारचा संभवतो, त्यापैकी जो काळ्या रंगाचा जड, स्निग्ध, रेव नसलेला व गोमूत्राच्या वासाचा असेल तो उत्तम. रसायनविधीने हा वापरल्यास शुक्रधातु वाढवून सर्वरोगनाशक होतो. वात पित्त-कफ नाशक औषधी काढ्यांच्या एक एक स्वतंत्र किंवा सर्व मिळून भावना देऊन वापरल्यास ह्याचा प्रभाव अधिक दिसतो.

**परीक्षा**— अग्नीवर टाकल्यावर जो महादेवाच्या

पिंडीच्या आकारासारखा होतो, व धूर निघत नाही, पाण्यात टाकल्यावर जो मिसळून जातो तो शुद्ध शिलाजीत समजावा. ऊषकादिगणात हा समाविष्ट आहे.

**–जतुप्रयोग**–पु., **त्रिफलारसेन शिलाजतुसेवनम् त्रिदोषजश्वयथुहरम्** ( चचि. १२.४९ ) **स्थौल्यविनाशकोऽयम्** ( अहृसू. १४.२३ ).
त्रिफळ्याच्या काढ्याबरोबर शिलाजतु सेवन करणे स्थूलतानाशक आहे.

**–जतुवटक**–पु., **पाण्डुरोगे कल्प०** ( चचि. १६.८७-९२ )
शिलाजित असलेल्या वटीचा उपयोग पांडुरोगात होतो.

**–जित्**–न., **खनिज० शिलाजतु** ( र. १९.३२ )
शिलाजित.

**–तल**–न., **शिलापृष्ठम्** ( अहृसू. ३०.११ )
खडकाचा सपाट तळ.

**–तोय**–न., **शिलोदकम्** ( र. ११.८८ )
ज्या पाण्यांत वनस्पती व प्राणी यांचे तुकडे ठेवले असता कांहीं दिवसांनी दगडासारखे कठिण बनतात ते.

**–त्वच्**–स्त्री., **खनिज० शिलावल्का** ( रा. ५.२१३; पृ. ३७ )
श्वेतशिला नामक दगडाचा प्रकार.

**–दद्रु**–पु., **खनिज० शैलेयम्** (ध. ३.७३; पृ. ११०)
दगडफूल.

**–धातु**–पु., **खनिज० सुवर्णगैरिकम्** ( रा. १३.२३३; पृ. १२९ ) सोनगेरु.

**–निर्घात**–पु., **व्यायाम० पाषाणाऽऽस्फालनम्** ( ड. सुउ. ६४.३८ )
दगडाचे गोटे उचलणे, झेलणे.

**–पट्ट**–न., **संघर्षकः पाषाणः** ( र. २.५० )
वाटण्याच्या उपयोगी, दगडी पाटा.

**–पुष्प**–न., **खनिज० शैलेयम्** ( ध. ३.७३; पृ. ११० )
दगडफूल.

**–पूत**–पु., **पारदयोग० पारदमनःशिलापाठेंद्रवारुण्यादिसाधितोऽयं हिक्काहरः** ( र. १३.७२-७५ )
सिद्धौषधाचे नाव. पारा, मनशीळ इत्यादींनी युक्त औषध. उचकीनाशक.

**–प्रसून**–न., **खनिज० शैलेयम्** ( रा. १२.१३१; पृ. १११ ) दगडफूल.

**–भेद्**–पु., **वनस्पति० पाषाणभेदः** ( ध. १.१५७; पृ. ३६ )
पाषाणभेद.

**–रम्भा**–स्त्री., **वनस्पति० काष्ठकदली** ( रा. ११.११०; पृ. १४९ )
रानकेळ.

**–वल्का**–स्त्री., **पाषाणभेदविशेषः, तद्गुणाः–स्वादुर्हिमः मेहकृच्छ्रविनाशनी, मूत्रारोधाश्मरीशूलक्षयपित्तापहारिका च** ( रा. ५.२१४ )
पाषाण भेदाचा प्रकार. याचे **गुण**– मधुर, थंड, मेह, मूत्रकृच्छ्र, मूत्ररोध, मूतखडा, शल्य, क्षय, व पित्तनाशक.

**शिलात्मक**–न., **खनिज० सैन्धवम्** (ध. २.२५; पृ. ७३)
सैंधव.

**शिलात्मज**–न., **खनिज० मुण्डलोहम्** ( रा. १३.२९; पृ. २११) मुंडलोह.

**शिलान्त**–पु., **वनस्पति० अश्मन्तकः** ( रा. ९.२९०; पृ. ४६ )
आपटा, घोळ.

**शिलिका**–स्त्री., **निशानार्थं नाम शस्त्रादितैक्ष्ण्यार्थं शिलाविशेषः** ( असंसू. ३४.३७ )
शस्त्रादींना धार लावण्याचा दगड, निसणा.

**शिलीन्ध्र**–न., **वृक्ष० वर्षासु भूमिः शिलीन्ध्रोज्ज्वला भवति, छत्रकम्** ( असंसू. ४.४२ )
अळंबे. वर्षाऋतूत भूमि भूछत्रांनी ( अळंबे ) उज्वल झालेली दिसते.

**शिलोञ्छवृत्ति**–वि., **भूमिपतितस्योत्सृष्टस्य कणशः शस्यग्रहणं शिलः भूमिष्ठमात्रस्य शस्यस्य ग्रहणमुञ्छः, तद्वृत्तिः तज्जीवनोपायाश्रयः इत्यर्थः** (सुचि.११.१२)
धान्यकापणीनंतर शेतजमिनीत किंवा खळ्याच्या भूमीवर पडलेले धान्य–कण वेचणे म्हणजे शिलोञ्छ आणि त्यावरच उपजीविका करणे ती शिलोंछवृत्ति.

**शिलोत्थ**–न., **खनिज० शैलेयम्** ( रा. १२.१३१; पृ. १११ ) दगडफूल.

**शिलोद्भव**–न., **खनिज० शिलाजतु** ( र. २.१२२ )
शिलाजित.
**शैलेयम्** ( ध. ३.७३; पृ. ११० ) दगडफूल.

**शिलोद्भेद**–पु., **वनस्पति० पाषाणभेदः** ( चचि. ३०.९० ) पाषाणभेद.

**शिलिपका**–स्त्री., **वनस्पति० गुणाः– मधुरा, शीता वृष्यं बलदं चास्या बीजम्** ( रापरि. ८.४९; पृ. ३६१ )

तृणजातीची वनस्पती. गुण–मधुर, शीत असून हिचे बी पुष्टि व बलदायक आहे.

**शिलिपन्**–पु., भैषज्य० **नखम्** ( ध. ३.५८; पृ. १०७ ) नखे.

**( शिलिपनी )**–स्त्री., वनस्पति० **शिलिपका** ( रापरि.८.४९; पृ. ३६१ ) तृण वनस्पती.

**शिल्लक**–पु., वनस्पति० **स्योनाकः** (ध. १.११५; पृ. २८) टेंटू.

**शिव**–वि., **क्षारस्य गुणेष्वेकः, सौम्यः** ( सुसू. ११.१६ ) क्षाराचा एक गुण, सौम्य.

पु., खनिज० **पारदः** ( र. १२.१२९-३२; रा. १३.४१; पृ.२१४; अहसू. ६.२७ ) पारा.

**निर्यास**० **गुग्गुलुः** ( ध. ३.१२७; पृ. १२० ) गुग्गुळ.

न., **कल्याणम्** ( सुचि. ३०.२७ ) कल्याण करणारे.

**खनिज**० **सैन्धवम्** ( ध. २.२५; पृ. ७३ ) सैंधव.

**श्वेतटङ्कणम्** ( रा. ६.३१; पृ. ७३ ) पांढरा टाकणखार.

**लोहम्** ( ध. ६.२६; पृ. २१० ) लोह.

**सामुद्रलवणम्** ( रा. ६.४२; पृ. ७५ ) मीठ, सामुद्रमीठ.

**वनस्पति**० **आमलकम्** ( ध. १.२१५; पृ. ५१ ) आवळा.

**(शिवा)**–स्त्री., वनस्पति० **आमलकम्** ( ध. १.१२५; पृ. ५१. असंसू. १५.४८ ) आवळा.

**भैषज्य**० **गोरोचना** ( रा. १२.३३; पृ. ९८ ) गोरोचन.

**वनस्पति**० **हरीतकी** ( ध. १.२०५; पृ. ४९. र. १२.३८-३९ ) हिरडा.

**नीलदूर्वा** ( रा. ८.२२६; पृ. १६३ ) द्र० 'दूर्वा' निळ्या ( हिरव्या ) दूर्वा.

**हरिद्रा** ( रा. ६.७९; पृ. १८ ) हळद.

**पक्षि**० ( असंशा. १२.५ ) पक्षी.

**–कृतागद**–पु., योग० **विषहरौषधगणः, गजपिप्पलिकासीसक्षारयष्टिमधूरकरक्तानतवचादन्त्यश्च** ( असंउ. ४० ) सिद्धौषधाचे नाव. गजपिंपळी, हिराकस, यवक्षार, मोह, मंजिष्ठ, तगर, वेखंड आणि दंतीमूळ–हा विषनाशक औषधिगण आहे.

**–ज**–पु., खनिज० **पारदः** ( रा. ११.८२ ) पारा.

**(–जा)**–स्त्री., वनस्पति० **लिङ्गिनी** ( रापरि. ३.१७; पृ. ३३० ) शिवलिंगी.

**–दारु**–पु., वनस्पति० **देवदारुः** (रा.१२.१०३;पृ.२१) देवदार.

**–द्रुम**–पु., वनस्पति० **बिल्वः** ( रा. ११.१३५; पृ. २७ ) बेल.

**–द्विष्टा**–स्त्री., वनस्पति० **केतकी** ( रापरि. १०.१; पृ. २०४ ) केवडा.

**–पिण्ड**–पु., वनस्पति० **बुकः** ( रा. १०.३३; पृ. १३८ ) रुई, मांदार.

**–पुष्पक**–पु., वनस्पति० **अर्कः** ( रा. १०.२४; पृ. १३७ ) रुई.

**–प्रिय**–न., वनस्पति० **रुद्राक्षः** ( रापरि. ११.१५; पृ. ३७४ ) रुद्राक्ष.

**–बीज**–न., खनिज० **पारदः** ( रा. १३.४१; पृ. २१४ ) पारा.

**–मत**–पु., वनस्पति० **वसुकः** ( रापरि. ५.३७; पृ. ३४३ ) वसू.

**–मल्लक**–पु., वनस्पति० **अर्जुनः** ( रा. ९.१९१; पृ. १९३ ) अर्जुनवृक्ष.

**–( मल्लिका )**–स्त्री., वनस्पति० **वसुकः** ( रापरि. ५.३७; पृ. ३४३ ) वसू.

**बुकः** ( ध. ४.१९; पृ. १३८ ) वसू.

**–मल्ली**–स्त्री., वनस्पति० **वसुकः** ( रा. १०.३४; पृ. १३८ ) वसू.

**–वल्लभा**–स्त्री., वनस्पति० **शतपत्री** ( ध. ५.१५१; पृ. २०१ ) शेवंती.

**-वल्लिका**-स्त्री., वनस्पति० **लिङ्गिनी**
( रापरि. ३.१६; पृ. ३३० )
शिवलिंगी.

**-वल्ली**-स्त्री., वनस्पति० **श्रीवल्ली**
( रापरि. ८.३३; पृ. ३५९ )
एक काटेरी वृक्ष.
**लिङ्गिनी** ( रापरि. ३.१७; पृ. ३३० ) शिवलिंगी.

**-शेखर**-पु., वनस्पति० **धत्तूरः**
( रा. १०.११; पृ. १३५ )
धोतरा.
वनस्पति० **वसुकः** ( रापरि. ५.३७; पृ. ३४३ )
वसू.
**बुकः** ( ध. ४.१९; पृ. १३८ ) पांढरी वसू.

**-संभव**-पु., खनिज० **पारदः** ( र. १.८७ ) पारा.

**शिवाक्ष**-पु.,वनस्पति०**रुद्राक्षः** (रापरि.११.१५;पृ.३७४)
रुद्राक्ष.

**शिवाङ्क**-पु., वनस्पति० **वसुकः** (रा. १०.३३; पृ. १३४)
वसू.

**शिवाटिका**-स्त्री., निर्यास० **नाडीहिङ्गु** (ध.२.४०; पृ.७७)
डिंक.
वनस्पति० **काकोदुम्बरिका** ( ध. ५.८८; पृ. १८७ )
काळा उंबर.
**श्वेतपुनर्नवा** ( असंउ. १२ ) पांढरा पुनर्नवा.

**शिवाटी**-स्त्री., वनस्पति० **श्वेतपुनर्नवा** (ड. सुउ. २३.४)
पांढरा पुनर्नवा.

**शिवात्मज**-न., खनिज० **सैन्धवम्** (रा. ६.३३; पृ.७३)
सैंधव.

**शिवाह्लाद**-पु., वनस्पति० **वसुकः** (रा.१०.३४; पृ.३१८)
वसू.

**शिवाह्व**-पु., वनस्पति० **वसुकः** ( ध. ४१९; पृ. १३८ )
वसू.

**( शिवाह्वा )**-स्त्री., वनस्पति० **रुद्रजटा**
( रापरि. ३.२४; पृ. ३३१ )
रुद्रजटा.

**शिवेशा**-स्त्री., वनस्पति० **शमी** (रा. ८.१५२; पृ.१८८)
शमी.

**शिवेष्ट**-पु., वनस्पति० **वसुकः** ( रा. १०.३३; पृ. १३८)
वसू.
**बिल्वः** ( रा. ११.१३४; पृ. २७ ) बेल.

**( शिवेष्टा )**-स्त्री., वनस्पति० **नीलदूर्वा**
( रा. ८.२२६; पृ. १६३ ) द्र० '**दूर्वा**.'

**शिवा**-स्त्री., ( ध. ५.९५ ) हिरडा.

**-फला**-स्त्री., वनस्पति० **शमी**
( ध. ५.९५; पृ. १८८ ) शमी.

**शिशिर**-पु., ऋतु० **उत्तरायणे आदानकाले माघ-फाल्गुनद्वयात्मकऋतुः** ( चसू. ६.४ ) **अस्मिन् तिक्तरसो बलवान् भवति । सर्वप्राणिनां बलाऽपहरणं च भवति । तत्र हेमन्ताऽपेक्षया शैत्यमधिकमादानकालजं रौक्ष्यं च भवति ।** (सुसू. ६.६-१० ) **तत्र हेमन्तर्तुवद् विधिः कार्यः**, द्र० '**हेमन्त**'
शिशिरऋतु. उत्तरायणातील आदानकालात माघ, फाल्गुन या दोन महिन्यांचा काल. या कालात तिक्तरस बलवान होतो. सर्व प्राण्यांचे बलाचे अपहरण होते. हेमन्तापेक्षा या ऋतूत थंडी आणि आदान कालाची रूक्षता अधिक असते. हेमंतऋतूप्रमाणेच यात आहारविहार करावा.
वनस्पति० **उशीरम्** ( रा. १२.२६; पृ. ९७ )
वाळा.
न. भैषज्य० **सामुद्रलवणम्** ( ध. २.३४; पृ. ७५ )
मीठ.
पु., कुधान्य० ( असंसू. ७.१५ )
राळे, सावे वगैरे तृणधान्य.

**( शिशिरा )**-स्त्री., वनस्पति० **नागरमुस्ता** ( रा. ६.६२; पृ. १५ )
नागरमोथा.
**रेणुका** ( रा. ६.१००; पृ. १०५ ) रेणुकबीज.

**-चर्या**-स्त्री., **शिशिरे आचरणविधिः हेमन्तवत् विधिः** ( सुउ. ६४.३१ ) **शिशिरतौं वर्तन० हेमन्ते या चर्या निर्दिष्टा सैव कार्या । शिशिरे हेमन्तापेक्षया शैत्यमधिकमस्ति तथादानकालजं रौक्ष्यमपि विद्यते अतः स्निग्धादिसेवनं विशेषतः कार्यम्** ( अहृसू. ३.९७ )
शिशिर ऋतूमध्ये हेमंतऋतूप्रमाणेच सर्व आचार विधि पाळावयाचे असतात. हेमंतऋतूपेक्षा शिशिरऋतूत थंडी अधिक असते व त्याबरोबर आदानकालाची रूक्षताही वाढते, म्हणून स्निग्धादींचे सेवन शिशिरऋतूत हेमंतापेक्षाही थोडे अधिकच करावे.

**-ज्वर**-पु., **शीतज्वरः** ( चचि. ५.१० )
थंडीताप.

**–द्वय**–न., वनस्पति० **एकं सितचन्दनमन्यद्रक्तचंदनञ्च** ( अहसू. १५.११ )
एक पांढरे चंदन आणि दुसरे रक्तचंदन.

**–प्रीति**–स्त्री., लक्षण० शैत्यप्रीतिः (अहसू. ११.१७)
शीतप्रियता.

**शिशिराभिनन्दा**–स्त्री., लक्षण० शीताभिलाषः ( ड. सुउ. ६.७ )
थंड द्रव्यांची आवड.

**शिशिराश्रुता**–स्त्री., लक्षण० नेत्राच्छीताश्रुस्रावः ( सुउ. ६.६ )
डोळ्यांतून थंड अश्रूंचा स्राव.

**शिशु**–पु., बालः ( कासंखिल. १२.३ ) बालक.

**–प्रिय**–पु., आहारद्रव्य० गुडः ( रा. १४.१९८; पृ. १६० ) गूळ.
आहारद्रव्य० **नवनीत** (ध. ६.२२९;पृ. २४८) लोणी.

**–मार**–पु., जलचरप्राणि० ( चचि. २(२).१० ) सपाद-जलजन्तुः, **अम्बुकूर्मः** (सुचि. २६.१९; र. १०.७६)
पाण्यात असणारे पाययुक्त प्राणी. घोरपड.

**–मारमज्जा**–स्त्री., शारीर० **अम्बुकूर्मस्य मज्जाख्यो धातुः निरुद्धमण्याख्ये गुह्यरोगे परिषेकार्थमुपयुज्यते** ( असंउ. ३९ )
निरुद्धमणि नामक गुह्यरोगात शेकण्यासाठी घोरपडीचा मज्जा हा धातु उपयोगात येतो.

**–मारवसा**–स्त्री., शारीर० **अम्बुकूर्मस्य मांसस्नेह गुह्यरोगे परिषेकार्थमुपयुज्यते** ( असंउ. ३९ )
निरुद्धमणि नामक गुह्यरोगात शेकण्यासाठी चरबी उपयोगी असते.

**शिशुकमदन**–पु., सर्प० **मण्डलिजातीय** (सुक. ४.३४)
शिशुकमदन नावाचा साप.

**शिष्य**–पु., छात्रः ( सुसू. २.३ ) विद्यार्थी, छात्र.

**शिष्योपनयन**–न., **शिष्यस्योपनयनम् अध्ययनार्थं शिष्यस्याचार्यसमीपे नयनम्** ( असंसू. १.१ )
शिष्याचे अध्ययनासाठी गुरुगृही आगमन.

**शिष्योपनयनीयाध्याय**–पु., (परिव०) अध्यायसंज्ञा० ( सुसू. २.१ )
शिष्योपनयनीय या नावाचा अध्याय. यात गुरूकडे शिष्याला नेण्याविषयीचे विचार आहेत.

**शीकर**–न., **सतुषारो वायुः** ( असंचि. ९ )
तुषारयुक्त वारा.

**शीघ्र**–वि., गुण० **अतिगतिः, झटितकर्मकारी** ( वातगुणः ) ( चवि. ८.१०० )
अतिवेग. त्वरित कार्य करणारा. ( वायूचा गुण ).
**क्षारस्य गुणेष्वेकः** ( सुसू. ११.१६ )
क्षाराच्या अनेक गुणात शीघ्र हा एक गुण आहे.
न., वनस्पति० **लामज्जकम्** ( ध. ३.८६; पृ.११३ )
वाळा.

**(शीघ्रा)**–स्त्री., वनस्पति० **दन्ती** ( ध. १.२२३; पृ. ५३ )
दंती.

**–पुष्प**–पु., वनस्पति० **अगस्त्यः** ( रापरि. १०.१३; पृ. ३६९ )
हदगा.

**–प्रभाव**–पु., पारदयोग० **पारदगंधकव्योमतीक्ष्णतालादिसाधितोऽयं ग्रहण्यतीसारादिघ्नः** ( र. १६.९६ )
पारा, गंधक, अभ्रक, लोह, हरताळ इ० नी सिद्ध केलेला औषधीयोग. ग्रहणी व अतीसारनाशक.

**–वलीपलित**–वि., **अकाले वलीपलितम्** (चशा.८.२१)
अकाली केस पांढरे होणे, सुरकुत्या पडणे.

**शीत**–वि., **अनुष्णः शीतलः** ( गुण० ) ( चसू. १.५९; सुसू. ४६.५१५; चशा. ६.१० ) थंड.
कल्प० **आपोथितात् द्रव्यात् प्रतप्ते तोये निशि संस्थितात् यः कषायः निर्याति सः** ( चसू. ४.७ )
शीतकल्प नावाचा काढ्याचा प्रकार. रात्री गरम पाण्यात औषधी द्रव्याची भरड भिजत घालून कुसकरून सकाळी गाळून घेतलेला थंड काढा.
**विंशतिगुणेष्वेकः** ( चशा. ६.१० )
वीस गुणांतील एक.
**श्लेष्मा** ( ड. सुशा. ३.१८ ) कफ.
न., लक्षण० **शैत्यम्** ( चसू.१४.२३ ) थंडी.
**रसाञ्जनम्** ( ड. सुउ. १७.१३-१४ ) रसांजन.
**कर्पूरम्** ( ड. सुउ. १७.१३-१४ ) कापूर.
वनस्पति० **चन्दनम्** ( अहसू. १५.३७ ) चंदन.
पु., **पर्पटः** ( रा. ५.६५; पृ. १६ ) पित्तपापडा.
**निर्यास० कर्पूरः** ( रा. १२.५६; पृ. १०१ ) कापूर.
वनस्पति० **त्वक्** ( रा. ६.७७; पृ. ७९) दालचिनी.
**बर्बरिकम्** ( रा. १२.१७०; पृ. ९५ ) चंदन.
पु., **निम्बः** ( रा. ९.४४; पृ. १३ ) निंब.
**श्लेष्मातकः** (रा. ११.१४८; पृ. १८८) भोकर.
**पीलुः** ( ध. ५.५१; पृ. १७८ ) पीलु.

**( शीता )**–स्त्री., वनस्पति० **तेजोवती** ( ध. १.२६६; पृ. २६१ )
मालकांगोणी.

कुटुम्बिनी ( रापरि. ५.२२; पृ. ३४१ )।
क्षीरिणी. पाण्यात होणारी दुधाळ वनस्पती.
शिल्पिका ( रापरि. ८.४९; पृ. ३६१ )
मऊ पानांची एक वनस्पती.
अतसी ( ध. ६.११५; पृ. २३१ ) अळशी.
बला ( रा. ४.४३२; पृ. ६६ ) चिकणा.
अतिबला ( रा. ४.४३०, पृ. ६५ ) मोठा चिकणा.
आमलकम् (रा. ११.३२५; पृ. ५१) आवळकटी.
आसुत० सुरा ( रा. १४.३०१; पृ. २५४ )
आसव, सुरा.

**–कषाय**–पु., कल्प० द्रव्यं संक्षुण्णमुष्णोदके प्रक्षिप्य निशास्थितम्। द्रव्यादापोथितात् तोये प्रतप्ते निशि संस्थितात्। यः कषायोऽभिनिर्याति, स शीतः समुदाहृतः ( चचि. ३.१९७ ) तस्य लक्षणम्–' द्रव्यमापोथितं सम्यगत्युष्णोदकसंस्थितम्। रात्रिपर्युषितं शीतकषायं फाणितं विदुः' ( सुचि. १६.११ )

शीतकषाय. शीतकल्प, पहा.
उकळत्या पाण्यात रात्री औषधाची भरड पूड भिजत घालून ठेवून सकाळी कुसकरून गाळून घेणे. ह्या थंड द्रवाला शीतकषाय म्हणतात. याला फाणित हे दुसरे नाव आहे.

**–काम**–वि., लक्षण० शीतं कामयमानः शीताभिलाषी ( चचि. १६.२१ )
थंडाची अपेक्षा असणारा.

**–कुम्भिका**–स्त्री., वनस्पति० काष्ठपाटला ( चचि. ३.२५८ ) पांढरी पाडळ.

**–क्षय**–पु., लक्षण० शैत्यहानिः ( अहृसू. १७.१५ )
थंड नाहीसे होणे. शैत्याचा नाश.

**–गन्ध**–पु., वनस्पति० चन्दनम् ( रा. १२.३; पृ. ९३ ) चंदन.

**–गात्र**–वि., लक्षण० ( मानिज्वर. १३; असंशा. ४.३१ )
अवयव थंड लागणे. अवयव थंड पडणे.

**–ज्वर**–पु., लक्षण० शीतयुक्तो ज्वरः ( चवि. २.७ )
थंडीताप.

**–तोय**–न., शीतोदकम् ( सुसू. ४६.४२० )
थंडपाणी.

**–दन्त**–पु., वाताद्दन्ता उष्णसहाः शीतस्पर्शेऽधिकव्यथाः भवन्ति। शूलेन दाल्यन्ते इव च वेदना ( असंउ. २५ )
शीतदंत हा एक विकार आहे, यात वातामुळे दातांना उष्ण खानपान बरे वाटते व शीतस्पर्शाने अधिक पीडा होते, शूल होतो व दात फुटतात अशी वेदना होते.

**–दन्तिका**–स्त्री., वनस्पति० नागदन्ती ( रापरि. ५.२७; पृ. ३४२ )
नागदवणा.

**–द्रव्याञ्जन**–न., शुक्तिकायां वैदूर्यादिसूक्ष्मचूर्णेन शर्कराक्षौद्रमिश्रितेनाञ्जनमाशुकर्मकारि ( सुउ. १०.१४ )
वैडूर्यादि रत्नाचे सूक्ष्म चूर्ण साखर आणि मध हे मिश्रण शिंपल्यामध्ये मिश्र करून त्याचे अंजन करणे डोळ्यांना त्वरित गुणकारी असते.

**–पाकिन्**–पु., वनस्पति० गुञ्जाभेदः ( काखिल. ११.१५१-५२ )
गुंजाचा प्रकार.
पु., वनस्पति० गण्डदूर्वा ( चचि. ३.२५८ )
गाठी दूर्वा.
गुञ्जा ( ध. ४२९; पृ. १४०; अहृसू. १.५६ )
गुंज.
शीतला मधुरस्कन्धगतद्रव्येष्वेकम् (चवि. ८.१३९)
मोठी कावळी, लाजाळू. मधुर गणातील एक द्रव्य.

**–( पाकिनी )**–स्त्री., वनस्पति० बला (रा. ४.४३२; पृ. ६६. )
बला. चिकणा.

**–पाक्य**–न., वनस्पति० बलाफलम्, गुणाः– रसपाकयोर्मधुरं शीतं रूक्षं विष्टम्भि दुर्जरं वातकोपनं रक्तपित्तप्रसादनं च ( सुसू. ४६.१९० )
बलाफल ( चिकणाफळे ) रस आणि विपाकाला मधुर, शीत, रूक्ष, अवष्टंभक पचावयास फार जड, वातप्रकोपक रक्त आणि पित्त यांना वाढविणारे आहे.

**–पादकरानन**–वि., लक्षण० शीतचरणहस्तमुखः ( सुचि. २.५१ )
पाय, हात आणि तोंड गार पडलेला.

**–पादकरोच्छ्वास**–वि., लक्षण० पादौ करौ उच्छ्वासः यस्यारिष्टभूतं त्रयमेतद्यदैकदैव शीतं भवति सः ( सुसू. ३१.१४ )
हात, पाय, आणि उच्छ्वास ही तीनहि ज्यांची एकाच वेळी थंडगार आहेत असा, अरिष्ट लक्षणी.

**–पिटिका** स्त्री., शीता पिडका ( असंशा. ९.२९ )
स्पर्शाला थंडगार लागणारा फोड, पुळी.

–पिडका–स्त्री., कफकृता पिडका ( चनि. १.२७ ) थंडगार स्पर्श असणारी कफाची पुळी.

–पित्त–न., रोग० शीतमारुतसंस्पर्शात् दुष्टौ कफवातौ पित्तेन मिलित्वा अन्तर्बहिर्विसर्पतः । तदा पिपासाऽरोचकहृल्लासाङ्गसादाङ्गगौरवाणि रक्तनेत्रत्वं च जायते ( मानि. )
शीतपित्त, अंगावर गांधी उठणे. थंड वाऱ्याच्या स्पर्शाने दुष्ट वात कफ पित्तासह आत बाहेर पसरतात तेव्हा अंगावर या गांधी उठतात; व तहान, रुचिनाश, तोंडाला पाणी सुटणे, अंग गळणे–जड वाटणे व डोळे लाल होणे ही चिन्हे होतात.

–पुष्प–पु., वनस्पति० शिरीषः ( रा. ९.१८८; पृ. १९२ ) शिरस.

(–पुष्पा )–स्त्री., वनस्पति० अतिबला ( रा. ४.४३०; पृ. ६५ )
अतिबला. मोठा चिकणा.

–पूतना–स्त्री., बालग्रह० तत्र लक्षणानि–कम्पो रोदनं तिर्यगीक्षणं तृष्णाऽन्त्रकूजोऽतीसारो वसावद्विस्रगन्धिता, एकस्य पार्श्वस्य शीतत्वमपरस्य चोष्णत्वम् ( असंउ. ३ )
बालग्रहातील एक प्रकार. त्याची लक्षणे— कंप, रडणे, तिरके पहाणे, तहान, पोटात गुरगुर, अतीसार, चरबी प्रमाणे दुर्गंधी, एक बाजू गार, दुसरी उष्ण.

–पूतनाप्रतिषेध–पु., अध्यायसंज्ञा० ( सुउ. ३४.१ ) या नावाचा अध्याय. शीतपूतना या ग्रहाच्या दुष्टीचे उपचार यात सांगितले आहेत.

–प्रतीकार–पु., शीतविपर्ययः ( उष्णोपचारादिः ) उष्णः ( सुसू. ३५.२१ )
थंडीचा प्रतीकार. उष्णोपचार इत्यादी. शैत्याचे विपरीत उष्ण.

–प्रभ–पु., निर्यास० कर्पूरः ( रा. १२.५६; पृ. १०१ ) कापूर.

–प्रशमनगण–पु., द्रव्यगण० महाकषायवर्गे एको गणः, तगराऽगुरुधान्यकशृङ्गवेरभूतीकवचाकण्टकार्यग्निमन्थश्योनाकपिप्पल्य इति शीतप्रशमनानि द्रव्याणि भवन्ति ( चसू. ४.१७ )
शैत्य नाहीसे करणाऱ्या औषधाचा वर्ग. महाकषाय वर्गातील एक वर्ग. त्यातील औषधे– तगर, अगरू, धने, आले, रोहिसगवत, वेखंड, काटेरिंगणी, टाकळी आणि पिंपळी.

–प्रिय–पु., वनस्पति० पर्पटः ( रा. ५.६५; पृ. १६ ) पित्तपापडा.

–फल–पु., वनस्पति० श्लेष्मातकः ( रा. ११.१४८; पृ. १८८ )
भोकर.
उदुम्बरः (रा. ११.१३७; पृ. १८६) औदुंबर, उंबर.
- न., रावणाम्लिका ( सुसू. ४६.१६३ ) एक फळ.

–भञ्जिरस–पु., पारदयोग० पारदरसकतालुतुत्थगंधकादिसाधितोऽयं विषमज्वरघ्नः ( र. १२.३०-३३ )
शीतभंजीरस नावाचे सिद्ध औषध. पारा, कलखापरी, हरताळ इत्यादी युक्त. विषमज्वराचा नाश करतो.

–भीरु–पु., वनस्पति० मल्लिका ( ध. ५.१३४; पृ. १९७ )
जाई, मोगरा.

–भीरुक–पु., शालिवर्गेषु एकः, द्र० 'शालि' ( सुसू. ४६.४; अहसू. ६.३ )
साळीच्या वर्गातील एक प्रकार.

–मञ्जरी–स्त्री., वनस्पति० शेफालिकाभेदः ( रा. ४. १२१; पृ. १५० ) द्र० 'शेफालिनिर्गुण्डी'
शेफाली, निरगुंडी, निगडी.

–मर्दक–पु., वनस्पति० रसोनः (रा. ७.९४; पृ.१४७) लसूण.

–मेह–पु., कफदोषप्रधानः प्रमेहभेदः, तल्लक्षणम्–अतिमधुरं शीतं मूत्रम् अतिमेहति ( चनि. ४.१०; असंनि. १० ) द्र० 'प्रमेह'
शीतमेह, कफमेहापैकी एक. त्याचे लक्षण–अति मधुर, थंड, लघ्वीला होते.

–रस–पु., शीतकषायः ( चचि.७.४४ ) थंड काढा.

–रसिक–पु., आसुत० शीतेक्षुरसकृतं मद्यम् । स च शीतरसिको ( सीधुः ) जरणीयो विबन्धघ्नः स्वरवर्णविशोधनः शोफोदराऽर्शसां हितो लेखनश्च ( सुसू. ४५.१८५; चसू. २७.१८५ )
शीतरसिक नावाचे उसाच्या थंड रसापासून केलेले मद्य. हे चांगले पाचक आहे. अवरोधनाशक, स्वर आणि वर्ण विशोधन करणारे आहे. सूज, उदर, मूळव्याध यांना हितकर. दोष खरडून काढणारे.

–वती–स्त्री., रेवतीग्रहस्य नाम ( का. बालग्रहचि. ) रेवतीग्रहाचे नाव.

–वरा–स्त्री., वनस्पति० बला (रा. ४.४३२; पृ. ६६) बला, चिकणा.

**-वल्कल**-पु., वनस्पति० उदुम्बरः
(ध. ५.८६; पृ. १८६) उंबर, औदुंबर.

**-वल्लभा**-स्त्री., वनस्पति० जम्बुभेदः
(ध. ५.८४; पृ. १८६) द्र० 'जम्बू' जांभळाचा भेद-प्रकार.

**-वल्ली**-स्त्री., वनस्पति० शीतपर्णी (चचि. ३.२६७)
वृक्षकलंबुका. शीतपर्णी. एक वनस्पती.

**-वात**-पु., रोग० अस्मिन्व्याधौ गात्राणि हिमवच्छीतानि रोमाञ्चो ज्वरोऽक्षिवेदनाऽऽलस्यं चेति लक्षणानि जायन्ते (र. २१.३; अहृसू. २९.६६)
शीतवात नावाच्या विकारामध्ये अवयव बर्फाप्रमाणे थंडगार होतात. अंगावर रोमांच उभे रहातात. ज्वर, डोळे दुखणे, आळस ही लक्षणे होतात.

**-वीर्य**-पु., वनस्पति० पद्मकः (ध. ३.८८ पृ. ११३)
पद्मकाष्ठ.
न., वीर्याख्यो गुणः शीतवीर्यं द्रव्यं ल्हादनं जीवनं स्तम्भनं रक्तपित्तयोः प्रसादं च करोति
(अहृसू. ९.१९)
वीर्य नावाचा एक गुण. शीतवर्य आनंद देणे, जीव जगविणे, स्तंभन करणे, रक्त आणि पित्त यांना प्राकृत करणे-इत्यादी कार्ये करते.

-(**वीर्या**)-स्त्री., वनस्पति० मेथिका
(ध. ६. १११; पृ. २३१)
लहान मेथी.
**नीलदूर्वा** (ध., ४. १४३; पृ. १६३) द्र० 'दूर्वा'
निळी दूर्वा.

**-वीर्यक**-पु., वनस्पति०० प्लक्षभेदः द्र० 'प्लक्ष'
(रा. ११.१२५; पृ. १८५)
पिंपरीचा प्रकार.

**-शिव**-पु., शतपुष्पाभेदः (सुचि. ११.१०)
बडीशेपेचा प्रकार.
**निर्यास**० कर्पूरः (सुसू. १४.३५) कापूर.
न., लवण० सैन्धवम् (ध. २.२५; पृ. ७३. असंसू. ३६.१०)
सैंधव.

(-**शिवा**)-स्त्री., वनस्पति० मिश्रेया
(ध. २.४; पृ. ६९)
रानबडीशेप.

**-शोफता**-स्त्री., लक्षण० शोफस्य शैत्यम्
(अहृसू. २९.९)
स्पर्शाला थंड अशी सूज.

**-संरोध**-पु., लक्षण० शीतस्य निरोधः
(अहृसू. ३.७)
थंडीचा अटकाव.

**-संवासा**-स्त्री., वनस्पति० वासन्ती
(ध. ५.१३९; पृ. १९८)
पांढरी जाई, नेवाळी, कस्तुरमोगरा.

**-सह**-पु., वनस्पति० निर्गुण्डी
(ध. ४.८१; पृ. १५०)
निर्गुंडी, निगडी.

(**-सहा**)-स्त्री., वनस्पति० शेफालिका
(रा. ४.११९; पृ. १५०)
निर्गुंडी.
**वासन्ती** (रा. १०.२३४; पृ. १९८)
मोठी जाई. कस्तुरमोगरा.

**-सहत्व**-न., लक्षण० शीतं सहते इति शीतसहः, तस्य भावः (चनि. १.३३)
थंड सहन होणे किंवा सोसणे.

**-साध्य**-वि., शीतोपक्रमसाध्यः (चवि. ३.३९)
थंड उपचाराने बरा होणारा.

**शीतक**-पु., लक्षण० शीतम् (चक्र. चचि. २१.३४)
थंड, थंडी.
**वनस्पति**० अम्ललोटः, अम्लस्कंधद्रव्येष्वेकम्
(चवि. ८.१४०)
आंबट वर्गातील एक. अंबोती, आंबटवेल.
**शीतज्वरः** (र. २९.१३८-१४०; हे. अहृसू. ५.३०)
**शीतपूर्वो विषमज्वरः** (अरु. अहृसू. ५.३०)
थंडी वाजून येणारा ताप, थंडी ताप.

**शीतल**-पु., वनस्पति० चम्पकः (ध. ५.१४२; पृ. १९९)
चंपक, चाफा.

(**शीतला**)-स्त्री., रोग० **भूताऽधिष्ठितविषमज्वरवद्देव्या शीतलयाऽऽक्रान्ता मसूर्यः शीतला बहिः ज्वरयेयुः। ताः सप्तविधाः ज्वरपूर्वा शीतला बृहत्स्फोटैः बृहती भवेत्। सा सप्ताहान्निःसरति सप्ताहाच्च पूर्णतां गच्छति। तृतीये सप्ताहे स्वयं शुष्यति स्खलति च। सा वातश्लेष्मसमुद्भूता कोद्रवा कोद्रवाकृतित्वात्। सा पाकं न गच्छति। कश्चित्तां पक्वेति प्राह। सा विशेषतो जलशूकवदङ्गानि विध्यति सप्ताहाद्दशाहाद्वा विनौषधमेव शान्तिं याति। पाणिसहेति ख्याता शीतला ऊष्मणा ऊष्मजारूपा सकण्डूः स्पर्शनप्रिया। सा सप्ताहात् स्वयमेव**

शुष्यति । चतुर्थी शीतला सर्षपाकारा पीतसर्षपवर्णिनी सर्षपिकेति नाम्ना प्रकीर्तिता । अत्राभ्यङ्गं विवर्जयेत् । एषा किञ्चिदूष्मनिमित्तेन राजिकाकृतिर्जायते । सा बालानां सुखं स्वयं शुष्यति । षष्ठी शीतला लोहितोत्तममण्डला कोष्ठवज्जायते । ज्वरपूर्वा सा व्यथायुक्ता । अस्यां ज्वरो दिनत्रयं तिष्ठति । स्फोटानां मेलनादेषा बहुस्फोटा दृश्यते । एकस्फोटे च सा कृष्णा चर्मजाऽभिधा च बोद्धव्या (मा. परि. भाव. मध्यमखंडे)

भूतांचे ( जंतूंचे ) अधिष्ठान असलेल्या ज्वराप्रमाणे शीतला देवीने आक्रमण केलेल्या मसूरी–शीतला बाह्य ज्वर करतात. त्या सात प्रकारच्या आहेत. (१) बृहती-शीतला (२) कोद्रव शीतला (३) पाणिसहा शीतला (४) सर्षपिका शीतला (५) राजिकाकृति शीतला (६) बहुस्फोटा (७) चर्मजा शीतला. (१) **बृहती** म्हणजे मोठ्या फोडाच्या; अगोदर ज्वर येऊन नंतर येणाऱ्या त्या बृहती. त्या सात दिवसात अंगावर उठतात, सात दिवसात पूर्ण होतात, तिसऱ्या आठवड्यात स्वतः सुकतात, खपल्या पडतात. (२) **कोद्रवशीतला**— वातकफापासून हरिकासारख्या स्वरूपाच्या उत्पन्न होणाऱ्या त्या कोद्रवा. ह्या पिकत नाहीत. काही तज्ञ त्या पिकतात असे म्हणतात. विशेषेकरून शेवाळाप्रमाणे अंगाला टोचतात. सात किंवा दहा दिवसांनी औषधाशिवाय बऱ्या होतात. (३) **पाणिसहा**— उष्णतेने होणाऱ्या घामाच्या पुळ्यांसारख्या खाज असणाऱ्या, स्पर्श आवडणाऱ्या, दिसावयास बऱ्या दिसणाऱ्या, सात दिवसात आपोआप सुकतात. (४) **सर्षपिका**— मोहरीसारख्या आकाराच्या, पिवळ्या मोहरीच्या रंगाच्या असतात. ह्या विकारात अभ्यंग करू नये. (५) राजिका— थोड्या अधिक उष्णतेमुळे राजिका नावाच्या शीतला होतात. त्या बालांना फारसा त्रास न देता सुकतात. (६) बहुस्फोटा— हिची तांबडी लाल चकंदळे पित्त उठावे तशी दिसतात. त्यामध्ये प्रथम ताप येतो. तो ३ दिवस राहतो. अंग दुखते. अनेक फोड एकत्र झाल्यासारखे दिसते. (७) **चर्मजा**— एकच सुटा मोठा काळा फोड येतो.

**वनस्पति० नीलदूर्वा** ( ध. ४.१४३; पृ. १६३ ) द्र० ' दूर्वा ' निळी दूर्वा.

कुटुम्बिनी ( रापरि. ५.२२; पृ. ३४१ ) पाण्यात होणारी दुधाळ वनस्पती.

**आरामशीतला** ( रापरि. १०.५२; पृ. ३७२ ) सुगंधी हिरव्या फुलांची एक वनस्पती.

श्रीवल्ली ( रापरि. ८.३३; पृ. ३५९ ) तिखट फळांची काटेरी आंबट वेल.

**–च्छद**–पु., वनस्पति० चम्पकः ( रा. १०.२३८; पृ. १९९ ) चाफा.

**–रजस्**–न., निर्यास० कर्पूरः (ध. ३.३१, पृ. १०१) कापूर.

**शीतलक**–पु., वनस्पति० जम्बीरः ( रा. १०.८०,पृ. १४४ ) ईडलिंबू.

न., वनस्पति० कुमुदम् (रा. १०.२४६; पृ. १६५) पांढरे कमळ.

**शीतांशु**–पु., चन्द्रः ( सुसू. ६.८ ) चंद्र.

**निर्यास० कर्पूरः** ( रा. १२.५६; पृ. १०१. अहसू. ३.५१) कापूर.

**शीताग्निता**–स्त्री., अग्नेः शीतत्वम्, विंशतिश्लेष्मविकारेष्वेकः, अग्निमान्द्यं पाचनाक्षमत्वम् ( चसू. २०.१७ ) अग्नीचे पचनाचे कार्य मंद होणे. वीस कफ विकारांतील एक. अग्निमांद्य. पचनाचे असमर्थत्व.

**शीताङ्ग**–पु., रोग० सन्निपातज्वरभेदः ( मा ज्वर. २ ) सान्निपातिक–त्रिदोषात्मक ज्वराचा प्रकार.

**लक्षणम्– हिमसदृशशरीरो वेपथु श्वास हिक्का शिथिलितसकलाङ्गः क्लमथुदवथुकासच्छर्द्यतीसारयुक्तोखिन्ननादोग्रतापः शीतगात्रः, प्रभावात् त्वरितमरणहेतुः** ( अश्विनीसंहिता. मा. २१,१३ )

शीतांगलक्षण– बर्फाप्रमाणे थंड शरीर, कंप, खोकला, श्वास, हिक्का ( उचकी ), अंगशैथिल्य, थकवा, डोळ्याची आग, ओकारी, अतीसार, फुटीर आवाज, अति दाह असणारा असा रोग. त्वरित मृत्यु आणतो.

**(शीताङ्गी)**–स्त्री., वनस्पति० हंसपादी ( रा. ५.१६७; पृ. २५६ ) राजहंस.

**शीताञ्जन**–न., स्रोतोञ्जनम् ( चक्र. चसि. ९.११५ ) कडू औषधांनी सिद्ध केलेले अंजन,

**शीताद**–पु., रोग० दन्तमूलगतरोगः, लक्षणम्–यस्या-कस्माद्दन्तवेष्टेभ्यः रक्तं प्रवर्तते, दुर्गन्धीनि कृष्णानि प्रक्लेदीनि मृदूनि च दन्तमांसानि शीर्यन्ते, परस्परं च पचन्ति । स कफशोणितसंभवः शीतादो नाम व्याधिः ( सुनि. १६.१४-१५ )
शीताद नावाचा दंतरोग. हा रोग दाताच्या मुळाच्या ठिकाणी होतो. यामध्ये दातातून एकाएकी रक्त येऊ लागते. दुर्गंधी, काळे, मऊ, ओलसर अशा हिरड्या झरतात, व एकमेकांचे पचन करतात. म्हणजे पिकवतात. हा कफरक्ताचा विकार आहे.
भैषज्य० राळः ( रा. १२.१७६; पृ. ११९ ) राळ.
न., वनस्पति० चन्दनम् ( रा. १२.२; पृ. ९३ ) चंदन.
रत्न० मौक्तिकम् ( रा. १३.६६; पृ. २१८ ) मोती.
वनस्पति० पद्मकः ( रा. १२.१४९; पृ. ११३ ) पद्मकाष्ठ.

**शीताभिप्रायता**–स्त्री., लक्षण० शीतप्रियत्वम् ( चनि. १.२४ ) थंड आवडणे.

**शीताभिभूत**–वि,, शीतजन्यव्याधिग्रस्तः (चचि. १.३५) थंडीपासून झालेल्या रोगाने पीडित.

**शीताभ्र**–पु., निर्यास० कर्पूरः ( ध. ३.३१; पृ. १०१ ) कापूर.

**शीताम्बु**–न., शीतजलम् शीताम्बुना विदग्धमन्नं शीघ्रं परिपाकमेति । अस्य शैत्येन पित्तं निहन्ति ( अहसू. १३.८ )
थंड पाणी. अर्धवट पचलेले अन्न थंड पाणी प्याल्याने लौकर पचते. पाणी द्रवधर्मामुळे अधोमार्गाने अन्नाला खाली नेते.

**शीतारि**–पु., पारदयोग० पारदस्यैकं भागं गन्धकस्य च द्वौ भागौ पुनर्नवाचित्रकयोः क्वाथेनादौ विमर्द्य पश्चादष्टगुणे पक्वार्कपत्ररसेन पाचयेत् । ततस्तत्र पारदादर्धभागं वत्सनाभं प्रक्षिप्य चित्रकस्य क्वाथेन विपाचयेत् । मात्रा–वल्लं तदर्धं वा । अनुपानम्–आर्द्रक–स्वरसः मरीचचूर्णं च सघृतम् । समय-मर्यादा–मासः, अयं योगो वातव्याधिविनाशनः ( र. २०.११-१२ )
शीतारी नावाचे सिद्धौषध. एक भाग पारा, दोन भाग गंधक घेऊन प्रथम त्याची कज्जली करावी, त्याला पुनर्नवा आणि चित्रक यांच्या काढ्यात घोटून नंतर पिकलेल्या रुईच्या पानाच्या आठपट रसात पाचन करून नंतर पाऱ्याच्या निम्मे प्रमाणाने शुद्ध बचनाग मिसळून चित्रकाच्या काढ्यात शिजवावे. घेण्याचे प्रमाण–एक वाल किंवा अर्धा वाल. अनुपान–आल्याचा रस व मिरपूड– तुपातून चाटवावा. घेण्याची जास्तीत जास्त कालमर्यादा– १ महिना. हा योग वातव्याधीनाशक.

**शीतार्तवा**–वि., शीतमार्तवं यस्याः सा (स्त्री) (का.गुल्म.१५) थंड आर्तव असणारी, स्त्री.

**शीतासहत्व**–न., लक्षण० शीतं न सहते, इति शीता-सहिष्णुत्वम् ( चनि. १.३३ ) थंड सहन न होणे.

**शीतिकाज्वर**–पु., शीतपूर्वो ज्वरः, विषमज्वरो वा ( र. ५.१८५-१९० )
शीतपूर्वक ज्वर, विषमज्वर, थंडीताप.

**शीतीकरण**–न., विशेषतः द्रवद्रव्यस्य अधिकत्वेन शीतल-करणोपायः, स च सप्तविधः–प्रवातस्थापनम्, उदकप्रक्षेपणं, यष्टिकाभ्रामणं, व्यजनं, वस्त्रोद्धरणं, वालुकाप्रक्षेपणं, शिक्यावलम्बनं च ( सुसू. ४५.१९ )
पातळ पदार्थाला अधिक थंड करण्याचा उपाय, सात प्रकारचा आहे. वाऱ्यावर ठेवणे, पाणी शिंपडणे, काठी फिरविणे, वारा घालणे, वस्त्राने गाळणे. वाळूवर ठेवणे, उंचावर शिंक्यासारखे उलटे टांगून ठेवणे.

**शीतोच्छ्वास**–वि., लक्षण० अरिष्टलक्षणभूतः शीतोच्छ्वासो यस्य सः ( चइ. ११.२० )
मरणदर्शक थंड उच्छ्वास लक्षण असणारा.

**शीतोदक**–न., शीतजलम् ( सुसू. ४६.४२४ )
द्र० ' जल ' थंड पाणी.

**शीतोदकमात्रा**–स्त्री., अल्पं शीतोदकम् ( सुचि. २९.१२ )
थोडेसे थंड पाणी, आवश्यक तेवढेच थंड पाणी घेणे, थंड पाणी प्रमाणात घेणे.

**शीतोपचार**–पु., शीतेन चिकित्सा, शीतस्पर्शद्रव्येनोप-क्रमः, रक्तपित्ते दाहादिषु च बाह्यतः शीतस्पर्श-द्रव्योपयोगः कार्यः ( सुउ. ४५.३८; अहसू. २७.४७ )
शीतवीर्य व शीतस्पर्श द्रव्यांच्या साह्याने केलेला उपचार. रक्तपित्त, दाह यात हा करावा.

**शीतोष्णव्यत्यास**–पु., शीतोष्णपरिवर्तनम्
(चनि. ५.६)
थंड आणि उष्ण असे एकामागून एक केलेले उपचार.

**शीधु**–पु., आसुत० पक्केक्षुरसकृतः मद्यविशेषः
(चसू. ६.१२)
उसाचा रस शिजवून त्याची केलेली दारू.

**शीरिन्**–पु., वनस्पति० मृदुदर्भः (ध. ४.१३३;पृ.१६१)
मऊ दर्भ.

**शीर्ण**–वि., जर्जरीभूतम् (अहृसू. २४.१)
सुकलेला, कृश, वठलेला.

**–पक्ष्मन्**–वि., शीर्णानि पक्ष्माणि यस्य सः
(अहृसू. २४.१)
ज्याच्या पापणीचे केस गळून पडले आहेत असा.

**–रोमक**–न., सुगन्धिद्रव्य० स्थौणेयम्
(ध. ३.६९; पृ. ११०)
गठोना. गंठीवन.

**–लोमन्**–वि., लक्षण० विगलितानि लोमानि यस्य सः
(चचि. १६.१५)
अंगावरील लोम (लव) गळून गेले आहेत असा.

**–वृत्त**–न., वनस्पति० त्रपुसम् (ध. १.१७९; पृ.४२)
काकडीचा प्रकार.

**–वृन्त**–न.,वनस्पति० त्रपुसभेदः,बालशीर्णवृन्तगुणाः– सक्षारं मधुरं कफावहं च । मध्यशीर्णवृन्तगुणाः– भेदनं दीपनं हृद्यं च। जीर्णशीर्णवृन्तगुणाः–आनाहाऽष्ठीलनुत् लघु च (सुसू. ४६.२२०;
अहृसू. ६.९०)
काकडीचा एक प्रकार. टरबूज. **कोवळयाचे गुण**— सक्षार, गोड, कफवर्धक. **मध्यमाचे गुण**— मळ फोडणारी, दीपक, हृदयाला हितकर. **जुन्याचे गुण**— पोटातील मळदोषनाशक, अष्ठीलानाशक, पचावयास हलके आहे.

**शीर्ष**–पु., वनस्पति० श्रीवेष्टकः (ध. ३.१३३; पृ.१२१)
ऊद, धूप.
न., वनस्पति० कालेयकम् (रा. १२.४०; पृ. ९९)
अगरूप्रकार, कृष्ण अगरू.

**–केसरक**–पु.,वनस्पति०बकुलः (ध.५.१५४;पृ.२०२)
बकुळ.

**–रोग**–पु., शिरोरोग० (चचि. ३०.२४१)
शिरोरोगः शिरोरोग.

**–विरेचन**–न., शिरोविरेचनम् (नस्यम्)
(चसू. १.७९) नस्य. डोक्याचे रेचक.

**शीर्षाद**–पु., कृमि० शिरःसर्पणशीलः (चवि. ७.२०)
शीर्षाद नावाचे कृमि. डोक्यात संचार करणारे.

**शील**–न., सहजं वृत्तम् (चइं. १.३) सहजो वस्तुषु रागः, शीलमनुशीलनेन परीक्षेत
(चक्र. चवि. ४.८; सुसू. ३०.३)
स्वभाव, वागणूक. वस्तूविषयी स्वभावतः प्रेम. नित्य सेवनाने शीलाचे परीक्षण करावे.

**शीलन**–न., सततक्रिया, अभ्यासः (अहृसू. १६.३; सुचि. ३७.७७)
अभ्यास, एकसारखी तीच तीच गोष्ट करणे.

**शीस**–न., खनिज० कासीसम् (अहृसू. १०.२७; रा. १३.१८९; पृ. ११९) हिराकस.

**शुक**–पु.,पक्षि० तन्मांसं रसे कषायं विपाके अम्लं, रूक्ष-शीतलं शोषकासक्षयहितं संग्राहि लघु दीपनं च (चसू. २७.७४; अहृसू. ३.४०; असंसू. ७.७२; ध. ६.४५०; पृ. २७७)
हिं.—तोता.
**म.—पोपट.**
बं.—टिया, पाखी.
ता.—किळि.
पोपट. त्याचे मांस विपाकाला तुरट, आणि आंबट असून रूक्ष, थंड. शोष, राजयक्ष्मा, खोकला यांत हितकारक आहे. मळ बांधणारे असून हलके दीपक आहे.
**वनस्पति० चर्मकारवटः** (सुउ. ५१.२३)
चांभारवड.

**–च्छद**–न., वनस्पति० स्थौणेयकम्
(ध. ३.६९; पृ. ११०)
ऊद, धूप.

**–जिह्वासंस्थान**–वि., आकृत्या शुकजिह्वाग्रसदृशम् (अर्शः) (सुनि. २.११)
पोपटाच्या जिभेसारखा (मूळव्याधमोड).

**–तरु**–पु., वनस्पति० शिरीषः (रा. ९.१८९;
असंउ. ८; पृ. १९२)
शिरीष.

**–तुण्ड**–पु., खनिज० किञ्चित्पीतश्चर्मारोऽपरपर्यायो हिङ्गुलप्रकारः (र. ३.१५५)
हिंगुळाचा प्रकार. किंचित् पिवळसर तांबडा. चर्मार हे दुसरे नाव.
**रक्तवर्णो गन्धकप्रकारः** (र. ३.१६) तांबडा गंधक.

**-नस**-पु., वनस्पति० **टिण्टुकः** ( काखिल. ११.९४ )
टेंटु.

**(-नसा )**-स्त्री., वनस्पति० **चर्मकारवटः; इयं एका नाडीव्रणोपयोगिनाम्** ( सुचि. १७.३७ )
टेंटु, चांभार-वड. ही नाडीव्रणात उपयोगी असणाऱ्यापैकी एक.

**-नाशन**-पु., वनस्पति० **चक्रमर्दः**
( रा. ४.९; पृ. १३५ )
टाकळा.

**-नास**-पु., वनस्पति० **टिण्टुकः**
( ध. १.११४; पृ. २८ )
टेंटू.

**-( नासा )**-स्त्री., वनस्पति० **शुकनासा, चर्मकारवटः**
( असंउ. ३९; सुचि. १.११५ )
टेंटू, हदगा. कुप्यक ( कनोजकडचे नाव. ) चर्मकार-जम्बूफलाशिका माळव्यात म्हणतात.

**-पिच्छ**-पु., खनिज० **अमलसारो गन्धकः**
( र. ३.१५ )
आवळसार गंधक.

**-पिच्छक**-न., खनिज० **अमलसारगन्धकः**
( र. २२.३०-३६ )
आवळसार गंधक.

**-पुच्छ**-न., वनस्पति० **स्थौणेयकम्**
( ध. ३.६९; पृ. ११० )
गंठीवन, गठोना, थुणेर.

**-पुच्छक**-न., वनस्पति० **स्थौणेयकम्**
( रा. १२.१२५; पृ. ११० )
थुणेर.

**-प्रिय**-पु., वनस्पति० **शिरीषः**
( ध. ५.११२; पृ. १९२ )
शिरीष.

**(-प्रिया )**-स्त्री., वनस्पति० **जम्बूः**
( रा. ११.१२८; पृ. १८६ )
जांभूळ.
**महाजम्बूः** ( रा. ११.१३०; पृ. १८६ )
द्र० ' जम्बू ' मोठे जांभूळ.

**-फल**-पु., वनस्पति० **अर्कः**
( रा. १०.२६;पृ. १.३७ )
रुई.

**-बर्ह**-न., वनस्पति० **स्थौणेयकम्**
( ध. ३.६९;पृ. ११० )
थुणेर.

**ग्रन्थिपर्णकम्** ( चसू. ५.२३ ) चोरओवा.

**-वक्त्र**-पु., निर्विषसर्प० ( असंउ. ४१ )
शुकवक्त्र-निर्विष साप.

**-पूर्णकण्ठत्वम्**-स्त्री., लक्षण० ( र. २८.१५ )
घशात कुसळे भरल्याप्रमाणे वाटणे.

**-वल्लभ**-पु., वनस्पति० **दाडिमः**
( ध. २.६१; पृ. ८१ )
डाळिंब.

**शुकाख्य**-पु., वनस्पति० **चर्मकारवटः** (ड. सुक. ७.३४)
चांभारवड.

**( शुकाख्या )**-स्त्री., वनस्पति० **चर्मकारवटः, अन्ये शुकशिम्बामाहुः** ( ड. सुउ. ४४.१९ )
चांभारवड किंवा शुकशिम्बा.

**शुकाह्वय**-पु., वनस्पति० **चर्मकारवटः**
( सुचि. १८.४८-४९ ) चांभार वड.

**शुकेष्ट**-पु., वनस्पति० **राजादनः** (रा. ११.१४७;पृ.१८७)
राजादन, खिरणीवृक्ष.
**शिरीषः** ( रा. ९.१८८; पृ. १९२ ) शिरीष.

**शुकोदर**-न., वनस्पति० **तालिसकम्**
( ध. २.५३; पृ. ८०. )
तालीसपत्र.

**शुक्त**-न., आसुत० **यन्मस्त्वादि शुचौ भाण्डे सगुड-क्षौद्रकाञ्जिकम् तत्** ( चसू. २७.२८४ ; असंसू. ७.२४३ ) **तद्गुणाः-मधुरं, तिक्तमम्लमुष्णं, तीक्ष्णं, लघु, कटु, रक्तपित्तकरं, पाचनं, भेदनं, मूत्रलं, हृद्यं, रोचनं, कफपित्तघ्नं, पाण्डुकृमिशिरोरोगनासिकादुर्गन्धनाशनम्**
( अहसू. ५.७६; ध. ६.२४६ )
**चुक्रम्, तण्डुलाम्बुसौवीरादिभिः कृतसंधानम्**
( ड. सुउ. ३९.२७२ )
तांदळाच्या पाण्यात आंबट पदार्थ घालून आंबवलेले द्रव्य. दह्याची निवळ वगैरे आंबट द्रव्य स्वच्छ भांड्यात घालून गूळ, मध व कांजी यांचे मिश्रण धान्य राशीत ३ दिवस ठेवावे म्हणजे तयार होणारा अम्ल द्रव. त्याचे गुण-मधुर, कडू, आंबट, उष्ण, तीक्ष्ण, लघु, तिखट, रक्तपित्तकर, पाचक, मलभेदक, मूत्रल, हृद्य, रुचिकर, कफपित्तनाशक, पांडु, कृमि, शिरोरोग व नाकात येणारा दुर्गंधनाशक आहे.
वि., **अम्लीभूतम्** ( काखिल. १६.९ )
आंबलेला पदार्थ,

**( शुक्ता )**–स्त्री., वनस्पति० अम्लिका ( ध. ५.३३; पृ. १७४ )
चिंच.
**–त्व**–न., अम्लता ( च. चचि. १५.४४ )
आंबटपणा.
**–पाक**–पु., लक्षण० शुक्तमिवान्नस्य पाकः ( चचि. १५.६० )
अन्नाचा आंबट पाक.
**शुक्तक**–पु., रोग० अम्लपित्तरोगः (काखिल. १६.४३ )
अम्लपित्त.
**शुक्ति**–स्त्री., मान० अर्धपलम् ( चक. १२.९१; सुचि. ६.१८ )
अर्धपल, दोन तोळे.
वनस्पति० बदरी ( चसू. २५.४९ ) बोर.
वारिशयप्राणि० मुक्ताप्रभवो जन्तुः ( चसू. २७.४० )
मोत्याचा किडा, पाण्यात राहाणारा.
नेत्ररोग० नेत्रस्य शुक्लभागे जलशुक्तिरिव किञ्चिद्दीर्घाः श्यावाः पिशितनिभा ये बिन्दवः, स शुक्तिसञ्ज्ञो नेत्ररोगः ( सुउ. ४.७ )
नेत्ररोग. नेत्राच्या पांढऱ्या बुबुळावर पाण्यातील शिंपल्याप्रमाणे किंचित लांब, काळे, मांसासारखे जे ठिपके दिसतात त्यांना शुक्ति असे म्हणतात.
व्याघ्रनखभेदः ( सुसू. ३८,२४-२५ )
वाघनखाचा प्रकार. मोठी नखी.
जलशुक्तिः ( सुचि. २०.३ )
पाण्यातला क्षुद्र शिंपला.
भैषज्य० नखम् ( ध. ३.५८; पृ. १०७ )
नख. सुगंधी द्रव्य.
प्राणिविशेषास्थि ( अहृसू. ३०.१६ )
विशिष्ट प्राण्याचे हाड, शिंपला.
**–चूर्ण**–न., बदरिका, तस्याश्चूर्णम् ( चचि. २५.६७ )
बोराचे चूर्ण.
**–ज**–न., रत्न० मौक्तिकम् (ध. ६.६२; पृ. २१८ )
मोती.
**–पर्ण**–पु., वनस्पति० सप्तपर्णः (ध. ३.८०; पृ. ११२ ) सातवीण.
**–प्रमाण**–न., अर्धपलप्रमाणम् ( सुउ. ५०.२५; पृ., १०७ ) अर्धपल प्रमाण. दोन तोळे-
**–शङ्ख**–पु., भैषज्य० नखम् ( रा. १२.१०७; पृ. १०७ ) नख,
**–संभव**–न., रत्न० मौक्तिकम् ( ध. ६.६२; पृ. २१८ ) मोती.
**( शुक्तिका )**–स्त्री., नेत्ररोग० शुक्तिः ( सुउ. ४.३ ) पित्तं सिताऽसितश्यावपीतकान् बिन्दून् कुर्यात् । सर्वं शुक्लं मलाक्तादर्शतुल्यं सदाहरुक् च भवति । रोगेऽस्मिन् शकृद्भेदतृष्णाज्वराश्च भवन्ति ( असंउ. १३ ) तत्र चिकित्सा–त्रैफलादिघृतेन तैल्वकेन वा दोषसंशोधनाऽनन्तरं शीतैर्द्रव्यैरञ्जनं कार्यम् ( सुउ. १०.१४ )
नेत्ररोग. पित्तामुळे पांढऱ्या बुबुळावर काळसर काळे पिवळे बिंदु उत्पन्न होतात. सर्व पांढरे बुबुळ मळकट आरशाप्रमाणे होते. दाह आणि ठणकाही असतो. या रोगात पातळ शौचाला होते. तहान, ज्वर हेहि असतात. चिकित्सा–त्रिफलादिघृत किंवा तिल्वकघृताने दोषसंशोधन करावे. नंतर शीतद्रव्याने अंजन करावे.
वनस्पति० अम्लिका (ध. ५.३३; पृ. १७४) चिंच.
**शुक्र**–न., सप्तधातुषु सप्तमो धातुः ( चसू. २८.४; अहृसू. १.१३ ) दशप्राणायतनेष्वेकम् (चसू.२९.३) शुक्रवहस्रोतांसि ( चवि. ५.८ ) शुक्रवहे द्वे, तयोर्मूलं स्तनौ वृषणौ च ( सुशा. ९.१२ ) नृणां कृत्स्नदेहाश्रितं शुक्रम् ( सुशा. ४.२३ ) शुक्रवहे द्वे धमन्यौ ( सुशा. ९.७ ) इति शुक्रस्थानानि । मज्ज्ञः शुक्रं प्रजायते ( चचि. १५.१६; सुसू. १४.१० ) यथा पयसि सर्पिः इक्षौ च रसो गूढस्तथा नृणां शरीरेषु शुक्रं विद्यते। प्रसन्नमनसो हर्षात्तत्संप्रवर्तते । बस्तिद्वारस्याऽधो द्व्यङ्गुले दक्षिणे पार्श्वे मूत्रस्रोतःपथात् पुरुषशुक्रं प्रवर्तते (सुशा.४.२१-२३) बालेऽपि शुक्रमस्ति । किन्तु यथा पुष्पमुकुलस्थो गन्ध इहास्तीति नैवास्तीति वा वक्तुं न शक्यते तथैव सौक्ष्म्याच्छुक्रस्याऽभिव्यक्तिर्नास्ति। बालानामपि वयःपरिणामात् शुक्रप्रादुर्भावो भवति। (चसू.१४.१८) रसो मासेन शुक्रीभवति ( सुसू.१४.१४)
केचिदाचार्या अहोरात्राच्छुक्रोत्पत्तिमाहुः।
अपरे षडहादन्नं शुक्रत्वं याति इत्याहुः । सुश्रुतादीनां मते मासेनाऽन्नं शुक्रं भवति (अहृशा.३.६५–६६) वृष्याणि क्षीररसमधुकमाषकूष्माण्डहंसादिपक्ष्यण्डप्रायाणि द्रव्याणि प्रभावेण सद्यः शुक्रं कुर्वते ( अहृशा. ३.६७ )
बहलं मधुरं स्निग्धमविस्रं गुरु पिच्छिलम् ( चचि. २,४(५०) ) अविदाहि, स्फटिकसंनिभम्

( चचि. ३०.१४५ ) द्रवं, मधुगन्धि, तैलक्षौद्रनिभं च (सुशा. २.११-१२) सौम्यम् (सुशा. ३.३) इति शुक्रस्वरूपम्। शुक्रसारलक्षणानि- सौम्याः सौम्यप्रेक्षिणः क्षीरपूर्णलोचना इव प्रहर्षबहुलाः स्निग्धवृत्तसारसमसंहतशिखरदशनाः प्रसन्नस्निग्धवर्णस्वरा भ्राजिष्णवो महास्फिचश्च शुक्रसाराः । ते स्त्रीप्रियोपभोगा बलवन्तः सुखैश्वर्याऽऽरोग्यवित्तसंमानाऽपत्यभाजश्च भवन्ति ( चवि. ८.१०९ ) स्निग्धसंहतश्वेताऽस्थिदन्तनखं बहुलकामप्रजं शुक्रेण ( सुसू. ३५.१६ ) शरीरे शुक्रस्याऽर्धाञ्जलिः प्रमाणम् ( चशा. ७.१५ ) शुक्रं धैर्यं च्यवनं प्रीतिं देहबलं हर्षं बीजार्थं च करोति ( सुसू. १५.४(१) ) शुक्रस्य श्रेष्ठं कर्म गर्भोत्पादनम् ( अहसू. ११.४ ) ओजः शुक्रमलः ( अहशा. ३.६४ ) ओजः शुक्रस्योपधातुः ( शार्ङ्ग. पूर्व. ५.१७ ) शुक्रवृद्धिलक्षणानि- वृद्धं शुक्रं अतिस्त्रीकामतां शुक्राश्मरीमपि करोति ( अहसू. ११.१२ ) शुक्रक्षयलक्षणानि- क्षीणे शुक्रे चिरात् प्रसिच्येत शुक्रं शोणितमेव वा । तोदोऽत्यर्थं वृषणयोर्मेढ्रं धूमायतीव च ( अहसू. ११.२० ) शुक्रदोषजविकाराः- शुक्रस्य दोषात् क्लीबमल्पायुः विरूपं वा अपत्यं प्रजायते । तथा गर्भो न जायते पतति प्रस्रवत्यपि । दुष्टं हि शुक्रं नरं सापत्यं सदारं च बाधते ( चसू. २८.१८-१९ ) क्लैब्याप्रहर्षशुक्राश्मरीशुक्रमेहशुक्रदोषाश्च तद्दोषजाः ( सुसू. २४.९ ) वाताऽदिभिरष्टधा शुक्रदुष्टिर्वातादिकुणपग्रन्थिपूयक्षीणमलाऽऽह्वयं बीजासमर्थं शुक्रमिति ( अहशा. १.१० )

शुक्र. सप्तधातूमध्ये हा सातवा धातु. दहा प्राणायतनांपैकी एक. शुक्रवह स्रोतसांचे मूळ स्तन आणि वृषणामध्ये असते. शुक्र मानवाच्या सर्व देहाश्रित आहे. शुक्रवह धमन्या दोन. ही शुक्राची स्थाने होत. मज्जेपासून शुक्र तयार होते. ज्याप्रमाणे दुधामध्ये तूप, उसामध्ये गूळ अदृश्य असतो तसे शरिरात शुक्र अदृश्य असते. प्रसन्न मनाने पुरुषाला हर्ष होऊन ते व्यक्त होते. बस्ति द्वाराच्या खाली दोन अंगुळे मूत्रस्रोतसाच्या द्वारे पुरुष शुक्र बाहेर येते. लहान मुलांच्या शरिरातही शुक्र असते. तथापि ज्याप्रमाणे फुलांच्या कळ्यांमध्ये सुगंध आहे किंवा नाही हे सांगता येत नाही त्याप्रमाणे सूक्ष्म प्रमाणामुळे मुलांच्या शरिरातील शुक्र असून ते प्रगट होत नाही, बालकांचेही वय वाढले की शुक्र उत्पन्न होते. रस धातु किंवा आहार रस महिन्याने शुक्र स्वरूपाला जातो. कांही आचार्यांच्या मते एका दिवस-रात्रीतच शुक्रोत्पत्ति होते असे म्हणतात. काहींच्या मते सहा दिवसांनी रसाला शुक्रत्व येते. सुश्रुत आदींच्या मते एक महिन्याने अन्नाचे शरिरात शुक्र होते. वृष्य द्रव्ये दूध, मांसरस, जेष्टमध, उडीद, कोहळा, हंसादिपक्ष्यांची अंडी ही द्रव्ये प्रभावामुळे ताबडतोब शुक्र निर्माण करतात. शुक्र हे दाट, गोड, स्निग्ध, दुर्गंध नसलेले, जड, बुळबुळित, दाह न करणारे, स्फटिकासारखे शुभ्र, द्रव, मधासारखा वास असणारे, तेल किंवा मधाच्या रंगाचे व सौम्य असते. शुक्रसार व्यक्ति---सौम्य स्वभावाची व सौम्य दृष्टीची असते डोळे दुधाळ-दुधाने भरल्यासारखे स्वच्छ, अतिशय हर्षयुक्त असतात (दिसतात). स्निग्ध, गोल, सारसंपन्न, सारखे, परस्पर संलग्न अशी टोके असणारे दात असलेली. तिचा वर्ण व स्वर ( आवाज ) प्रसन्न आणि स्नेहयुक्त असतात. ती तेजस्वी असते व तिचे कुल्ले मोठे असतात. अशा प्रकारची शुक्रसारयुक्त व्यक्ति स्त्रियांस प्रिय असते. स्त्रियांचा उपभोग घेणारी व बलवान, सुख-ऐश्वर्य-आरोग्य-संपत्ति-सन्मान आणि संततिसौख्य भोगणारी असते.

शुक्रामुळे मनुष्य स्नेहयुक्त, अस्थि-दात व नखे घट्ट व शुभ्र असून पुष्कळ कामविकारप्रवण व संततियुक्त असतो. सर्व शरिरात शुक्रधातूचे प्रमाण अर्धी ओंजळ आहे. शुक्र हे धैर्ययुक्त, स्खलनशील, प्रीती, देहबल, हर्ष व प्रजोत्पत्ती करणारे आहे. शुक्राचे श्रेष्ठ कर्म गर्भ निर्माण करणे हे आहे. ओज शुक्रमल आहे. ओज शुक्राचा उपधातु आहे. अशी आणखी दोन मते ओजाबद्दल आहेत.

शुक्रवृद्धीची लक्षणे---स्त्रीसंगाची अतिशय इच्छा होते व त्याला शुक्राश्मरीसुद्धा होते. शुक्रक्षीणतेची लक्षणे-शुक्राचा स्राव फार उशीरा होतो. कदाचित शुक्राऐवजी रक्ताचाच स्राव होतो. वृषणात ठणका फार होतो व शिश्नातून धूर आल्यासारखे वाटते. शुक्राच्या दोषाने नपुंसक, अल्पायुषी, कुरूप मूल होते. तसेच गर्भ राहात नाही. राहिला तर गर्भस्राव किंवा गर्भपात होतो. दुष्ट शुक्र हे त्याला, संततीला व पत्नीला बाधक होते. नपुंसकत्व, विषयवासना न होणे, शुक्राचा खडा, ( शुक्राश्मरी ), शुक्रमेह व

इतर शुक्ररोग शुक्रदोषामुळे होतात. वातादी आठ प्रकारच्या दुष्टीमुळे शुक्र गर्भसंभवाला, प्रजोत्पादनाला असमर्थ ठरते.

**नेत्ररोग० शुक्रं द्विविधं सव्रणमव्रणं च, यत् कृष्णे दृश्यरूपं भवेद्यद्वै सूच्येव विद्धं प्रतिभाति, उष्णमश्रु स्रवति, अत्यर्थं च पीडां करोति, तत् सव्रणशुक्रम्। इदं रक्तजमसाध्यं च। तत्रापि यत् दृष्टेः समीपे न भवेदवगाढं च न संस्रवेत्, अवेदनावन्न च युग्मशुक्रं, तत् सव्रणशुक्रं कदाचित् साध्यं भवेत्। असितप्रदेशे सितं स्यन्दात्मकं नातिरुक् नात्यश्रुयुक्तमाकाशे इवाच्छघनाऽनुकारि भाति। तदव्रणं शुक्रं साध्यतममिष्यते। गम्भीरजातं बहलं चिरोत्थितं शुक्रं कृच्छ्रम् अस्ति।** ( सुउ. ५.४-९ ) **सव्रणशुक्रचिकित्सा–सव्रणं शुक्रमुत्तानमवगाढं कर्कशं वाऽपि शिरीषबीजादिभिर्घर्षयेत्। ताम्ररजःशङ्खादिभिरञ्जनं शुक्रनाशनं भवति। बिभीतकाऽस्थिमज्जा सक्षौद्रः शुक्रनाशनो भवति। अव्रणशुक्रचिकित्सा–रक्तविस्रावणं प्रदेहपरिषेचननस्यधूमाश्चोतनाऽभ्यञ्जनतर्पणस्निग्धपुटपाकालेख्याऽञ्जनानि। रक्तविस्रावणादिनोपक्रान्तस्य लेख्याञ्जनेनाऽव्रणं शुक्रमपहर्तव्यम्** ( सुउ. १२.२७; असंउ. १३ ) **साध्य व्रणशुक्रलक्षणम्–नेत्रस्य कृष्णभागे सितं स्यन्दाऽऽत्मकमल्परुगश्रुयुक्तमभ्रदलानुकार्यव्रणशुक्रम्** (सुउ.५.८)

अव्रण शुक्र व सव्रण शुक्र हे दोन नेत्ररोगाचे शुक्र आहेत. **सव्रण शुक्र**—काळ्या बुबुळावर निर्माण होणारा, अत्यंत खोल, अस्पष्ट दिसणारा, सुईने मध्यावर भोक पाडले आहे असा भासणारा, उष्ण अश्रूंचा स्राव ज्याच्यामुळे सारखा वाहतो आहे, अत्यंत ठणका असणारा सव्रण शुक्र विकार होय. हा रक्तापासून उत्पन्न झालेला व असाध्य असतो, मात्र जो दृष्टीच्या ( बाहुलीच्या ) अत्यंत जवळ नसेल व फार खोल नसून स्राव येत नसेल, वेदना नसतील, एकच व्रण असेल तो सव्रण शुक्र कदाचित बरा होईल.

**अव्रण शुक्र**—काळ्या बुबुळावर झालेले पांढरे, थोडासा स्राव येणारे, फार पीडा नसणारे, अश्रुधारा ज्यामध्ये सारख्या वाहात नाहीत असे, आकाशात जसे स्वच्छ मेघ असतात तसे अव्रण शुक्र साध्य आहे. डोळ्यात खोल, पसरलेला, व पुष्कळ दिवसांचा जुनाट रोग कष्टसाध्य असतो.

**उपचार— सव्रण शुक्ररोगात—** वरच्या पहिल्या किंवा दोन तीन पटलात असणाऱ्या व्रणाला शिरीष बीज, मिरे, पिंपळी, सैंधव किंवा नुसते सैंधव घासावे. ताम्र शंख इत्यादींचे अंजन शुक्रनाशक आहे. बेहेड्याच्या बीतील मज्जा मधात उगाळून डोळ्यात अंजन घालावे. **अव्रण शुक्र रोगात—** रक्तस्राव, लेप, औषध शिंपडणे, नाकात औषध, धूम्रपान, औषधी थेंब, अंजन, डोळ्यांभोवती पाळी करून पातळ औषध भरून त्यात डोळ्यांची उघडझाप करणे, पुटपाक, दोष खरडून काढणारी अंजने यांचा उपयोग करावा.

पु., **मास० आषाढमासः** ( चवि. १.( २ ). १३; सुसू. ६.६ )

शुक्र महिना—आषाढ महिना.

**ज्येष्ठमासः** ( असंउ. ४९ ) ज्येष्ठ महिना.

**( शुक्रा )**–स्त्री., **भैषज्य० वंशरोचना** ( रा. ६.८५; पृ. ८१ )

वंशलोचन.

**–कर**–वि., **शुक्रोत्पत्तिकरम्** ( अहसू. ५.४१ )

शुक्राची उत्पत्ती करणारे.

**–क्षय**–पु., **शुक्रस्य क्षयः, शुक्रोदुष्टिः** ( चवि. ११.६५ ) **शुक्रक्षये मेढ्रवृषणवेदनाऽशक्तिर्मैथुने चिराद्वा प्रसेकः, प्रसेके चाल्परक्तशुक्रदर्शनम् व्यवायशोषे शुक्रक्षयलिङ्गं च** (सुउ. ४१.१७) **शुक्रक्षये क्षीरसर्पिषोरुपयोगो मधुरस्निग्धशीतानामपरेषां च द्रव्याणाम्** ( असंसू. १९.१४ ) **तथा च शुक्रक्षीणो नरः मयूरकुक्कुटहंससारसानां ग्राम्यानूपौदकानाम् च अण्डानि अभिकांक्षति** ( सुसू. १५.२९-३१ )

शुक्राचा क्षय. शुक्रक्षयामुळे मेढ्र ( शिश्न ) वृषण या ठिकाणी वेदना, मैथुनामध्ये अशक्तता, उशिराने शुक्रस्राव अल्प प्रमाण–केव्हा केव्हा रक्तासह शुक्रस्राव. अति मैथुनाने उत्पन्न झालेल्या क्षयामध्ये वरील लक्षणे होतात. **उपचार**— दूध, तूप यांचा उपयोग तसेच गोड, स्निग्ध, थंड, अशा दुसऱ्या द्रव्यांचा उपयोग करावा. मोर, कोंबडा, हंस, सारस यांची अंडी द्यावीत.

**–क्षीण**–वि., लक्षण० **शुक्रं क्षीणं यस्य सः** (सुसू. १५.२९-३१)
ज्याचे शुक्र क्षीण झाले आहे असा.

**–ग्रह**–पु., लक्षण० **शुक्रस्य ग्रहः रेतोविबन्धः** (अहृसू. १९.३) शुक्राचा अवरोध.

**–घ्न**–वि., **शुक्रक्षयकरम्** (असंसू. १२.४७)
शुक्रनाश करणारे.

**–जननगण**–पु., द्रव्यगण० **चतुष्के महाकषायवर्गे एको गणः, जीवकर्षभककाकोलीक्षीरकाकोलीमुद्गपर्णीमेदावृद्धरुहाजटिलाकुलिङ्गा इति दशेमानि शुक्रजननानि द्रव्याणि भवन्ति** (चसू. ४.१२; असंसू. १५.२४)
शुक्र निर्माण करणारा वर्ग– या वर्गामध्ये जीवक, ऋषभक, काकोली, क्षीरकाकोली, मुद्गपर्णी, माषपर्णी, मेदा, वृद्धरुहा, जटिली, कुलिंगा ही दहा द्रव्ये शुक्रजनक आहेत.

**–द**–वि., **शुक्रवृद्धिकरः** (सुसू. ४६.३५९-३६१)
शुक्रवृद्धि करणारा.

**–दोष**–पु., **शुक्रधातोः विकृतिः क्लैब्याप्रहर्षादयः शुक्रदोषाः** (सुसू. २४.९)
शुक्रधातूची विकृति, नपुंसकत्व, विषयवासना नसणे, इ० शुक्र दोष होत.

**–धरा**–स्त्री., शारीर० **रेतोधरा कला** (सुशा. ४.२०)
शुक्रधरा कला.

**–नाशन**–बि., **शुक्रघ्नः, शुक्रं नाशयतीति** (चसू. २६.६२)
शुक्रनाशक.

**–प्रदोष**–पु., **शुक्रविकारः** (चसू. १.१११)
शुक्राचा विकार.

**–भाण्डी**–स्त्री., वनस्पति० **श्यामा त्रिवृत्** (ध. १.२४५; पृ. ५७)
काळे निशोत्तर.

**–मांसल**–वि., **शुक्रं मांसं च यो जनयति सः** (चसि. १०.२९) **काकोली क्षीरकाकोली मुद्गपर्णी शतावरी विदारी मधुयष्ट्याऽऽह्वा शृङ्गाटककशेरुके आत्मगुप्ताफलं माषाः गोधूमा यवा जलजानूपजं मांसमित्येते शुक्रमांसलाः** (चसि. १०.२८-२९)
शुक्र आणि मांसवर्धक औषधे. काकोली, क्षीरकाकोली, मुद्गपर्णी, शतावरी, विदारी, ज्येष्ठमध, शिंगाडा, कसाडा, खाजकुहिलीच्या बिया, उडीद, गहू, सातू, पाण्यातील किंवा आनूप प्रान्तातील प्राण्याचे मांस.

**–मेह**–पु., रोग० **कफदोषप्रधानः प्रमेहभेदः** (चनि. ४.१०; सुनि. ६.१०) **तत्र नरः शुक्राऽऽभं शुक्रमिश्रं वा मेहति** (असंनि. १०.१५) **दूर्वादिकषायः ककुभचन्दनकषायोऽत्रोपयोज्यः** (सुचि. ११.९) द्र० 'प्रमेह'
शुक्रमेह. कफमेहातील प्रकार. यामध्ये शुक्रयुक्त किंवा शुक्रासारखे लघ्वीला होते. यावर दूर्वादि किंवा अर्जुन, चंदन यांचा काढा द्यावा.

**–ल**–वि., **शुक्रकरम्** (चसू. २६.६१)
शुक्र निर्माण करणारे.

**–वहा सिरा**–स्त्री., **शुक्रवाहिनी सिरा** (सुशा. २.४५)
शुक्रवहन करणारी शीर.

**–वहस्रोतस्**–न., **शुक्रवहनार्थं स्रोतो०** (चवि. ५.८) **तस्य स्थानम्—वृषणौ। शुक्रवहस्रोतश्छेदात् मरणं क्लैब्यं वा भवति** (सुचि. ७.३६) **तुदुष्टिः अकालयोनिगमनाभिग्रहादतिमैथुनाच्छस्त्रक्षाराऽग्निभिश्च भवति** (चवि. ५.१९)
शुक्रवहनाकरिता शुक्रवह स्रोतस. त्याचे स्थान वृषण. शुक्रवह स्रोतसाच्या छेदामुळे मरण, षंढत्व येते. अकाली मैथुन, शुक्राचा अवरोध, अति मैथुन, शस्त्र, क्षार, अग्नि यामुळे शुक्रवह स्रोतस दुष्ट होते.

**–वाहिन्**–वि., **शुक्रं वहतीति** (असंशा. ६.४३)
शुक्र वाहणारा.

**–वाहिस्रोतस्**–न., स्रोतो० **शुक्रवहस्रोतः** (चवि. ५.१९)
शुक्रवाही स्रोतस.

**–विधारण**–न., **शुक्रवेगनिग्रहः चलितशुक्रस्य बलाद् धारणम्। शुक्रवेगविधारणं वा** (सुचि. २४.११९)
शुक्राचा वेग धारण करणे. शुक्राचा सुरू असलेला प्रवाह मुद्दाम थांबविणे.

**–विष**–वि. **शुक्रे विषं यस्य सः, यथा मूषिकाः शुक्रविषाः** (सुक. ३.५)
ज्यांचे शुक्र विषारी आहे असे प्राणी. जसे उंदीर.

**–वृद्धिकृत्**–वि., **शुक्रवृद्धिकरम्** (असंसू. ७.३२)
शुक्रवृद्धि करणारे.

**–वेगधारण**–न., **शुक्रवेगावरोधः शुक्रवेगविधारणात्तत्स्रवणं गुह्यवेदनाश्वयथुर्ज्वरा हृद्व्यथामूत्रसङ्गाङ्गभङ्गवृध्यश्मषण्ढताश्च भवन्ति। शुक्ररोधज-**

**विकारेषु ताम्रचूडसुराशालीनां सेवनं बस्तिरभ्यङ्गाऽवगाहनं तथा बस्तिशुद्धिकरैः सिद्धं क्षीरं प्रियाः स्त्रियश्च भजेत्** ( अहृसू. ४.१९ )
शुक्रवेग अडविल्यामुळे शुक्राचा स्राव होतो. गुह्यवेदना, सूज, ज्वर, हृदयव्यथा, मूत्रसंग, अंग फुटणे, वृषणवृद्धि, मूतखडा व षंढता हे विकार होतात. यावर कोंबड्याचा मांसरस, जुने तांदूळ, बस्ती, अभ्यंग, अवगाहन, बस्ती शुद्ध करणाऱ्या द्रव्याने सिद्ध केलेले दूध ही घ्यावीत व प्रिय अशा स्त्रियांचा उपभोग घ्यावा.

**–वेगनिग्रह**–पु., **शुक्रवेगधारणम्, षाण्ढ्यकराणां श्रेष्ठः** ( चसू. २५.४०; असंसू. १३.३ )
शुक्रवेगनिग्रह. हा नपुंसकत्व निर्माण करणाऱ्या कारणात श्रेष्ठ आहे.

**–शुद्धिकरवर्ग**–पु., **कुष्ठैलवालुककट्फलकाण्डेक्षवेक्षुरब्धिफेनकोशीरैः वसुकेक्षुरकैः शुक्रं सकदम्बनिर्यासैः शोधयेत्** ( असंसू. १५.२५ )
शुक्रशुद्धि करणाऱ्या द्रव्यांचा वर्ग– कोष्ठ, एलवालुक, कायफळ, कास, ऊस, समुद्रफेस, काळा वाळा, वसु, तालिमखाना आणि कळंब वृक्षाचा डिंक.

**–शोणितप्रकृति**–स्त्री., **शुक्रशोणितमेलनकाले ऋतुरूपे यो दोष उत्कटो भवति, स प्रकृतिमारभते** ( च. चवि. ८.९५ )
शुक्र आणि आर्तव ( शोणित ) यांच्या संयोगकाली जो दोष उत्कट असेल तो प्रकृति उत्पन्न करतो. ही दोषप्रकृति होय.

**–शोणितसंसर्ग**–पु., **शुक्रशोणितमेलकः** ( चशा. ३.३ )
शुक्र व आर्तव यांचा संयोग.

**–शोधन**–वि., **शुक्रदोषहरः** (चसू. ४.८)
शुक्र दोष नाहीसे करणारा.

**–शोधनगण**–पु., **द्रव्यगण० चतुष्के महाकषायवर्गे एको गणः। कुष्ठैलवालुककट्फलसमुद्रफेनकदम्बनिर्यासेक्षुकाण्डेक्षिवक्षुरकवसुकोशीराणीति दशेमानि शोधनानि द्रव्याणि भवन्ति** ( चसू. ४.१२; असंसू. १५.२५ )
शुक्रशोधन करणारा गण. यामध्ये कोष्ठ, एलवालुक, कायफळ, समुद्रफेस, कळंबाचा डिंक, उसाचे कांडे, तालीमखाना, वसु, आणि काळा वाळा ही आहेत.

**–संपद्**–स्त्री., **शुक्रस्याऽदुष्टत्वरूपोत्कर्षः** ( चशा. २.६ )
उत्कृष्ट शुक्र. शुक्राच्या गुणांचे उत्कृष्टत्व.

**–सार**–वि., **शुक्रं सारं परोत्कृष्टबलं यस्य सः, तल्लक्षणानि–सौम्याः सौम्यप्रेक्षिणश्च क्षीरपूर्णलोचना इव प्रहर्षबहुलाः, स्निग्धवृत्तसारसमसंहतशिखरदशनाः प्रसन्नस्निग्धवर्णस्वरा भ्राजिष्णवो महास्फिचश्च शुक्रसाराः। ते स्त्रीप्रियोपभोगा बलवन्तः सुखैश्वर्याऽऽरोग्यवित्तसंमानाऽपत्यभाजश्च भवन्ति** ( चवि. ८.१०९; सुसू. ३५.१६ )
शुक्रसार. हा माणूस दिसावयास सौम्य असतो. याचे पाहाणेहि सौम्य असते. डोळे दुधाळ, सदोदित आनंदी आणि स्निग्ध असतात. रंग आणि स्वर प्रसन्न असतो. त्याच्या दातांची टोके सारखी घट्ट असून, गोल व बळकट ( दृढ ) असतात. तेजस्वी, मोठे ढुंगण असलेला असा माणूस शुक्रसार समजावा. हा पुरुष स्त्रियांना आवडतो. तो स्त्रियांचा उपभोग घेतो. बलवान असून सर्व सुखे, ऐश्वर्य, आरोग्य, द्रव्य, मानमान्यता, मुलेबाळे यांचे बाबतीत सुखी असतो.

**–स्रवण**–न., **शुक्रस्य स्रवणम्** ( अहृसू. ४१९ )
शुक्राचा स्राव.

**शुक्रक**–पु., **नेत्ररोग०** ( अहृसू. २४.२ ) **द्र० 'नेत्ररोग'**
शुक्रक नावाचा नेत्ररोग.

**शुक्रल**–वि., **शुक्रकरः** ( चसू. २६.६९ )
शुक्रकर, शुक्रवर्धक.

**शुक्राघात**–पु., **शुक्रस्याऽवरोधः** ( अहृसू. १७.२७ )
शुक्राचा अवरोध.

**शुक्राशय**–पु., **शारीर० शुक्रस्याऽऽशयः वृषणौ** ( चचि. २६.७२ )
शुक्राचा आशय. वृषणे.

**शुक्राश्मन्**–पु., **रोग० शुक्राश्मरी** ( अहृसू. ६.१९ )
शुक्राश्मरी. शुक्रजन्य मूतखडा.

**शुक्राश्मरी**–स्त्री., **रोग० शुक्रदोषजविकारेष्वेकः, शुक्रनिमित्ताऽश्मरी** ( सुनि. ३.१२; सुसू. २४.९; अहृसू. ११.१२; असंनि. ९.१७ )
शुक्रदोषामुळे झालेल्या विकारापैकी एक. शुक्राची अश्मरी, शुक्रदोषामुळे झालेला मूतखडा.

**शुक्रोत्सेक**–पु., **शुक्रस्रावः, शुक्राऽऽधिक्यम्** ( सुचि. ३७.१२६ )
शुक्राचा स्राव. शुक्राचे आधिक्य.

**शुक्ल**–वि., **वर्ण० धवलः** ( सुसू. ३२.३ ) पांढरा.

**कार्पासवर्णम्** ( सुसू. ४६.२१२-२१३ )
कापसाच्या रंगाचा.
**नेत्रस्थं शुक्लमण्डलम्** (र. २३.३१; असंसू. ७.३६)
डोळ्यातील पांढरा भाग.
**वनस्पति० जीरकः** ( ध. २.६८; पृ. ८३ ) जिरे.
**कुन्दः** ( ध. ५.१५०; पृ. २०१ ) कुंद.
**एरण्डः** ( ध. १.२९५; पृ. ६७ ) एरंड.

**( शुक्ला )**–स्त्री., **वनस्पति० काकोली**
( ध. १.१३२; पृ. ३१ )
काकोली, कावळी.
**मधुरस्कन्धे द्रव्य० शर्करा** ( चक्र. चवि. ८.१३९ )
साखर.
**विदारी** ( ध. १.१४७; पृ. ३४ ) भुईकोहळा.

**–कन्द**–पु., **वनस्पति० शुभ्रालुः**
( रापरि. ७.३३; पृ. ३५० )
पांढरे अळु.

**(–कन्दा)**–स्त्री., **वनस्पति० अतिविषा** (ध. १.१०; पृ.८)
अतिविष.

**–कर्कटक**–पु., **पादिष्वेकः, श्वेतवर्णकुलीरः**
( सुसू. ४६.१११ )
पांढरा खेकडा.

**–गतरोगविज्ञानीय**–वि., **अध्यायसंज्ञा०**
( सुउ. ४.१ )
या नावाचा अध्याय. यात डोळ्याच्या पांढऱ्या कवडी-वरच्या रोगांची माहिती. आहे.

**–पुष्पा**–स्त्री., **वनस्पति० विष्णुक्रान्ता**
( ध. ४.११५; पृ. १५७ )
विष्णुक्रांता.

**–पुष्पी**–स्त्री., **वनस्पति० नागदन्ती**
( रापरि. ५.२७; पृ. ३४२ )
सूर्यकमळप्रकार.

**–भागगतरोग**–पु., **रोग० नेत्रस्य शुक्लभागे संभूतो रोगः । शुक्लभागस्यैकादशरोगाः प्रदिष्टाः सुश्रुतेन** ( सुउ. ४.३-४ ) **रोगाः–(१) प्रस्तार्यर्म (२) शुक्लार्म (३) क्षतजार्म (४) अधिमांसार्म (५) स्नाय्वर्म (६) शुक्तिका (७) अर्जुनः (८) पिष्टकः (९) सिराजालम् (१०) सिरापिडकाः (११) बलासकः**
( सुउ. ४.३-४ ) **द्र० ' नेत्ररोग. '**
नेत्राचे पांढऱ्या बुब्बुळावर होणारे विकार. हे ११ आहेत, नावे वर आहेत.

**–मणि**–पु., **रत्न० मौक्तिकम्**
( रा. १३.६७; पृ. २१८ ) मोती.

**–मण्डल**–न., **शारीर० नेत्रमण्डलेष्वेकं, तेष्वपि च नेत्रे श्लेष्मणः प्रसादाच्छुक्लमण्डलं तत्पितृजम्**
( असंशा. ५.५१ )
नेत्रांतील पांढरा बुब्बुळ. डोळ्याच्या मंडळातील एक. कफाच्या सार प्रसादरूप अंशापासून हे होते. हे पित्याच्या अंशापासून होते.

**–मेह**–पु., **श्लेष्मनिमित्तः प्रमेहभेदः, तल्लक्षणम्–नरः कफप्रकोपात् शुक्लपिष्टनिभं मूत्रं प्रमेहत्यभीक्ष्णम्**
( चसू. १९.४ ( ९ ) **द्र० ' प्रमेह. '**
शुक्लमेह. प्रमेहाचा प्रकार. कफाने पिठासारखे मूत्र होते.

**–रोहित**–पु., **वनस्पति० श्वेतरोहितः**
( रा. ८.१८; पृ. १९६ ) **द्र० ' रोहितक. '**
पांढरी सावरीचा प्रकार.

**–वर्ग**–पु., **शुक्लद्रव्याणां वर्गः, खटिनीश्वेतसंयुक्ताः शङ्खशुक्तिवराटिकाः भृष्टाऽश्मशर्करा चेति शुक्लवर्गः**
( ध. ७.६३; पृ. ३०७ )
शुक्ल म्हणजे पांढऱ्या द्रव्यांचा वर्ग. खडी, श्वेत, वर्णाचा शंख, शिंप, कवडी आणि भाजलेली वाळू.

**–वर्ण**–वि., **शुक्लवर्णीयः ( पदार्थः ) यथा कार्पासास्थि-तक्रभस्मक्षारादिः** ( सुसू. २९.२७ )
पांढऱ्या वर्णाचे पदार्थ. उदा० कापूस, अस्थी, ताक, भस्म, क्षार वगैरे.

**–वृक्ष**–पु., **वनस्पति० धवः** (रापरि. ९.५; पृ. २०५)
धावडा.

**–शाल**–पु., **वनस्पति० कैडर्यः** ( रा. ९.४८; पृ.१४ )
विशाल निंब, पर्वतनिंब, महारुख, वारूळ.

**–शेफालिका**–स्त्री., **शेफालि, निर्गुण्डी**
( ध. ४.८३; पृ. १५० ) निर्गुंडी.

**शुक्लाक्ष**–पु., **जलचरपक्षि० मल्लिकाक्षभेदः, हंसभेदः, अन्ये मलिनचञ्चुचरणहंसभेदः**
( ड. सुसू. ४६.१०५-१०६; असंशा. २.५७ )
हंसप्रकार. ज्याची चोच व पाय मळकट ( पिंगट ) आहेत असा हंसप्रकार. पांढऱ्या डोक्याचा हंस.

**शुक्लांगी**–स्त्री., **वनस्पति० शेफालि निर्गुण्डी**
( रा. ४.१२१; पृ. १५० ) निर्गुंडी.

**शुक्लार्क**–पु., **वनस्पति० श्वेतार्कः** (रा. १०.२९; पृ.१३७)
पांढरी रुई, मांदार.

**शुक्रार्मन्**–न., **नेत्ररोग० नेत्रशुक्रभागगतो रोगः** ( सुउ. ४.३-४ ) **नेत्रस्य शुक्रभागे कोमलं किञ्चिच्छ्वेतमर्म चिरेण वर्धते स शुक्रार्माख्यो नेत्ररोगः** ( सुउ. ४.५ ) **तच्चिकित्सा–विस्तीर्णं तनु वा शुक्रार्म शुक्रवदेव लेखनाञ्जनैरेवोपचरणीयम्** ( सुउ. १५.१७; असंउ. १३ ) द्र० **'नेत्ररोग.'**
डोळ्याच्या पांढऱ्या बुबुळावर होणाऱ्या विकाराचे नाव. पांढऱ्या बुबुळावर कोमल, किंचित उंचवटा असणारा, फार उशीरा वाढणारा असा एक रोग. त्याला शुक्रार्म म्हणतात.

**शुङ्ग**–पु., **नवपल्लवः** ( चसू. १.७४ )
कोवळी पालवी.
**शुङ्गा**–स्त्री., **नवपल्लवम्, प्रत्यग्रपल्लवः** ( सुचि. ३४.१२ )
नवी पालवी.

**शुचि**–वि., **शुचिताकरम्** ( चसू. ५.९९ )
पवित्र. पवित्र करणारे.
**बाह्याभ्यन्तरशौचयुक्तः** ( सुसू. ३४.१९-२१ )
**अनुपहतम्** (ड.सुसू. ४५.२०) **वैद्यगुणेष्वेको गुणः**
अंतर्बाह्य शुद्धि झालेला–असलेला. कशाचाही अनिष्ट परिणाम न झालेले. अविकृत. निर्दोष. वैद्याच्या ठिकाणी आवश्यक गुणांपैकी एक गुण ( वैद्य काया वाचा मनाने पवित्र असावा. )
पु., **मास० ज्येष्ठमासः** ( चचि. १(२). १३; सुसू. ६.६ ) **आषाढमासः** ( चसि. ६.५ )
ज्येष्ठ महिना, आषाढ महिना.
–**द्रुम**–पु., **वनस्पति० पिप्पलः** ( ध. ५.७९ ) पिंपळ.
–**वीर**–पु., **वनस्पति० दर्भः** ( ध. ४.१३३ ) दर्भ.

**शुण्ठ**–पु., न-, **वनस्पति० गुण्ठः** ( ध.१.८३ )
रोहिसगवताचा एक प्रकार.

( **शुण्ठी** )–स्त्री., **वनस्पति० सुगन्धिकन्दविशेषः, शुष्कार्द्रकम्, महाकषायवर्गे तृप्तिघ्नगणे तृष्णानिग्रहणगणेऽर्शोघ्नगणे चैकं द्रव्यम्** ( चसू.४.११-१४ ) **गुणाः–कटुरुष्णा स्निग्धा वृष्या कफवातघ्नी शोथकृम्यरुचिश्वासपाण्डुश्लीपदोदरशूलबन्धाध्माननाशिनी** ( ध. २.८२ ) **रसशेषाजीर्णनाशिनी** ( सुसू. ४६.५११ ) **कामलाघ्नी** ( सुउ. ४४.३० ) **हिक्कानाशिनी** ( सुउ; ५०·२२ ) **शीर्षविरेचने उपयुज्यते** ( चसू.२.५ )
हिं.—अदरक, सोंठ.
**म.—सुंठ.**
गु.—अदु.
बं.—अदा, सोंठ.
ता.—चक्कु, शुखु.
फा.—झंजाबिल.
सुंठ. सुकलेले आले. एक सुगंधी कंद. **गुण**—तिखट, उष्ण, स्निग्ध, शुक्र धातूला हितकर, कफवातनाशक; सूज, कृमि, बेचव, श्वास, पांडु, उदर, शूल, पोटफुगी, अवरोध, आणि हत्तीपायनाशक. रसशेषाजीर्ण कावीळ व उचकीनाशक. तृप्तिघ्न, तहाननाशक, मूळव्याधनाशक गणातील एक–डोक्याला रेचक देण्याला उपयोगी.

**शुण्ठक**–न., **वनस्पति० शुण्ठी** ( चचि. १२.४४ ) सुंठ.

**शुण्ठिक**–न., **वनस्पति० शुण्ठी** ( चचि. १२.४४ ) सुंठ.

**शुण्डिक**–पु., **वनस्पति० व्रीहिः** ( रा.१६.११७ )
एक प्रकारचा तांदूळ.

**शुण्डिन्**–पु., **वनस्पति० व्रीहिः** ( रा. १६.११७ )
एक प्रकारचा तांदूळ.

**शुण्डी**–स्त्री., **वनस्पति० वस्तिशुण्डी** ( रापरि. ५.२० )
एक वनस्पती, इंद्रवारुणी, कवंडळ.

**शुद्ध**–वि., **योग्य औषधप्रयोगः, या भेषजयोजना दोषमेकं शमयेन्नान्यं दोषमुदीरयेत्, सा शुद्धः प्रयोग इत्युच्यते** ( चनि. ८.२३ )
योग्य औषधियोजना. जी औषधियोजना एका इष्ट दोषाचे शमन करील पण अन्य दोषाची दुष्टि करणार नाही तो शुद्ध प्रयोग, योजना.
**शोधितः, कृतवमनविरेचनादिः** ( अहृसू. २०.१३; ४.२० )
वांती रेच इत्यादिकांनी शुद्ध झालेला.
**केवलः, इतराऽसंबद्धः** ( सुनि. १.६३ )
केवळ. इतरांचा संबंध–मिश्रण–संपर्क नसलेला.
वि., **कषायरञ्जितम्** ( सुचि. ३५.१५ )
बैल इत्यादींचा बस्ति उपयोगात आणण्यास योग्य करताना, तुरट रसांच्या वनस्पतींच्या काढ्यात ठेवून रंगविलेला.
**सत्त्वगुणबहुलम्** ( चशा. ४.३७ )
सत्व गुणांचे आधिक्य असलेला.
**न., लवण० सैन्धवम्** ( ध. २.२५ ) सैंधव.

(**शुद्धा**)–स्त्री., **शर्करा** ( ध. २.१०४ ) साखर.

**कुसुम्भम्** ( ध. ६.११८ ) कर्डई.

**–कण्ठता**–स्त्री., **लक्षण० शुद्धकण्ठस्य भावः,** ( अहृसू. १४.१७ )

घसा शुद्ध असणे.

**–कोष्ठ**–वि., **शुद्धं कोष्ठं यस्य सः; शोधितकोष्ठः** ( चचि. १.२८ )

निर्मल, शुद्ध कोठा असलेला. शुद्ध केलेल्या कोठ्याचा.

**–देह**–वि., **वमनविरेचनादिभिर्यस्य शोधितो देहो यस्य सः** ( र. १६.१२-२५ )

ओकारी, रेच यांनी ज्याचा देह निर्मल व निर्दोष झाला आहे असा.

**–लोह**–न., **खनिज० त्रयो लोहप्रकाराः, शुद्धं लोहं पूतिलोहं मिश्रलोहं चेति। तत्र स्वर्णरजतताम्रलोहानि शुद्धलोहानि** ( र.५.१ )

धातूंच्या ३ प्रकारांपैकी एक. तीन प्रकार– शुद्ध, पूति, व मिश्रलोह. त्यात सोने, रुपे, तांबे, लोखंड हे शुद्ध लोह–धातु आहेत.

**–वातहत**–वि., **शुद्धेन कफाद्यसंसृष्टेन वातेन हतः** ( सुनि.१.६३ )

कफादिकांचा संबंध नसता शुद्ध वाताने अवयव विकल केलेला रोग. केवळ वाताने केलेला रोग. ( अर्धांगवात ).

**–व्रण**– पु., **स्रावरहितो व्रणः, लक्षणानि–त्रिदोषैरनाक्रान्तः श्यावौष्ठः पिडकाऽन्वितः समोऽवेदनो निरास्रावश्च,** ( असंउ. २९ )

शुद्ध व्रण. शुद्ध जखम. स्रावरहित व्रण. तिन्ही दोषांपैकी एकाही दोषाने दुष्ट नसलेला. जखमेच्या कडा सावळ्या, त्यावर पुळ्या, जखमेचा तळ सारखा, वेदना नसणारा व स्राव नसणारा.

**–शुक्र**– वि., **शुद्धं शुक्रं यस्य सः, अदुष्टशुक्र इत्यर्थः** ( असंशा. २.२२ )

शुद्ध शुक्र असलेला.

**–शुक्रक**– न., **नेत्ररोग० कफाच्छङ्ख इव नातिरुक् शुक्रं च। तत्साध्यम्** ( असंउ. १३.२२६ )

कफामुळे थोडी वेदना असणारा, शंखासारखा पांढरा ठिपका काळ्या बुबुळावर असणे. तो रोग साध्य.

**–सत्त्व**– वि., **सात्त्विकप्रकृतिः, लक्षणम्– आरोग्यं प्रशमो रूपं ज्ञानं विज्ञानं आर्यता दीर्घमायुः सुखाऽत्यक्तं च** ( कासू. २८ )

शुद्ध सत्त्व म्हणजे पूर्ण सात्त्विक प्रकृतीचा. शुध्द मनाचा. सात्विक मनाचा. लक्षणे– उत्तम आरोग्य, शांत स्वभाव, चांगले रूप, ज्ञान, कलांचे ज्ञान, मोठे मन, दीर्घ आयुष्य.

**शौचमास्तिक्यं– कृतज्ञता दाक्षिण्यं व्यवसायः शौर्यं गाम्भीर्यं बुद्धिर्मेधा स्मृतिः शुक्लधर्मरुचिर्भक्तिरनभिष्वङ्गस्तमोगुणविपर्ययश्चेति शुद्धसत्त्वलक्षणानि** ( असंशा. ५.१९ )

**लक्षणे**—अंतर्बाह्य शुद्ध, श्रुति स्मृति इत्यादींवर विश्वास, कृतज्ञता, सर्वांबद्दल आदर, सतत कार्यांत निमग्न, शूरत्व, गंभीरपणा, बुद्धि, धारणाशक्ति चांगली असणे, पूर्ण सुखी.

**–सत्वज**–वि., **शुद्धसत्वयुक्तः** ( असंशा. ५.१९ )

शुध्द सत्वाने युक्त, शुद्ध मनाचा.

**–स्तन्यलक्षण**–न., **शीतलममलं तनु शङ्खावभासमप्सु न्यस्तमेकीभावं गच्छत्यफेनिलमतन्तुमन्नोत्प्लवतेऽवसीदति वा, तच्छुद्धमिति विद्यात्** ( सुशा. १०. ३१ )

स्तन्य म्हणजे स्त्रीचे दूध.ते शुध्द असल्याची लक्षणे—स्पर्शाने शीतल, स्वच्छ, पातळ, शंखाच्या रंगाचे, पाण्यात टाकल्यास चटकन मिसळते, फेस नसतो, त्यात तंतु नसतात, पाण्यावर तरंगत नाही वा तळाशी बसत नाही ते दूध शुद्ध जाणावे.

**–स्नाता**–वि., **रजसाऽऽदौ शुद्धा पश्चात्स्नाता अन्तर्बहिःशुद्धेत्यर्थः** ( सुशा. २.२५; का. जातिसूत्रीय. शा. ७ )

तीन दिवस रजस्राव झाल्याने शुद्ध झाली ( अंतःशुध्द ) व स्नानाने बाह्य शुद्ध झाली अशी अंतर्बाह्य शुद्ध झालेली.

**–हृदयता**–स्त्री., **हृदयस्य निर्मलत्वम्, निर्मलहृदयता** ( अहृसू. १४.१७ )

हृदयाची निर्मलता.

**शुद्धातीसार**–पु., **रोग० निरामातीसारः** ( अहृसू. १९.२ ) द्र० **'अतिसार'**

आमविरहित केवळ दोषांचा अतिसार, निराम अतिसार. पहा ' अतिसार. '

**शुद्धानिलार्त**–वि., **असंसृष्टेन अनिलेन पीडितः, केवलवातपीडितः** ( चचि. २८.११८ )

आम किंवा कफपित्त ज्याच्या जोडीला नाही अशा एकट्या वाताने पिडलेला. केवळ वाताने पिडलेला.

**शुद्धार्तवा**–वि., शुद्धमदुष्टमार्तवं यस्याः सा (सुशा. २.२४)
दोषांनी दुष्ट नसलेले, शुद्ध रज असलेली स्त्री.

**शुद्धावर्त**–पु., यदा धातूनां सत्वपातनविधौ वह्निः प्रदीप्तज्वालः श्वेतोच्छ्रायसंयुक्तश्च भवेत्तदा स शुद्धावर्तो ज्ञेयः। अयमेव कालः सत्त्वनिर्गमनार्थं योग्यः। रसार्णवेऽस्यैव नाम 'लोहावर्त' इति प्रसिद्धम् (र. ८.५८)
जेव्हा धातूचे सत्व पाडताना मुसेच्या वरची प्रदीप्त ज्वाला पांढरी येते तेव्हा शुद्धावर्त म्हणावे. हाच काळ सत्व पडल्याचा–तयार झाल्याचा योग्य काळ समजावा. लोहावर्त असेही म्हणतात.

**शुद्धास्र**–न., शुद्धरक्तम् (अहृसू. २६.४२) शुद्ध रक्त.

**शुद्धि**–स्त्री., शोधनं नाम दोषापाकरणम् (चचि. १२.५; चसि. १.१२; सुशा. २.१; असंसू. २९.२२; अहृसू. २७.४७)
दोष घालवणे, शोधन करणे.

**–कर**–बि., शुद्धिं शोधनं करोति इति शुद्धिकरः (अहृसू. १९.६१)
शुद्धि-शोधन करणारे दोष घालवणारे (औषध इ०)

**–काङ्क्षिन्**–वि., शोधनाभिलाषी, यः शुद्धिं काङ्क्षते सः (असंसू. ७)
शुद्धि करू इच्छिणारे. शोधनाची अभिलाषा आकांक्षा असणारे.

**–वर्ग**–पु., भैषज्यगण० अयं शोधनगुणयुक्तः काचटङ्कणशिप्राणां समूहः (र. ३.१६५)
शोधन करणारे–दोष घालविणारे गुण असलेल्या द्रव्यांचा समुदाय. काचलवण, टाकणखार आणि म्हशीचे मूत्र ही द्रव्ये धातूचे सत्त्व शुद्ध करणारी आहेत.

**–शुद्ध**–वि., शोधनादिना शुद्धः (असंसू. २७.२१)
शोधन करणाऱ्या औषधांनी शुद्ध झालेला, दोषविरहित.

**शुद्धोद्गारता**–स्त्री., लक्षण० शुद्धोद्गारस्य भावः (अहृसू. १४.१७)
शुद्ध ढेकर येणे (आंबट, खारट, तिखट, द्रव, बरोबर नसणे)

**शुध्द्युपाय**–पु., शुद्धीकरणार्थं कृत उपायः (चशा.५.१३)
दोष घालवण्याकरिता–शुद्धि करण्याकरिता केलेला उपाय.

**शुनकचञ्चुका**–स्त्री., वनस्पति० क्षुद्रचञ्चुः (रापरि. ४.२२)
लहान चंचु.

**शुनकचिल्ली**–स्त्री., वनस्पति० चिल्लीभेदः, गुणाः– कटुस्तीक्ष्णा कण्डूतिव्रणहारिणी च (रापरि. ७०)
चिली, चील. गुण– तिखट, तीक्ष्ण, अति-खाज, व्रण नाशक.

**शुभ**–वि., न., मान० प्रस्थद्वयम्, अष्टाविंशत्यधिकशततोलकं मानम् (र. ११.८)
वजन, एकशे अठ्ठावीस तोळे.
**दर्शनस्पर्शनरसनघ्राणनश्रवणादिभिर्यत्सुखदं तच्छुभम्** (सुउ. ४७.२५)
पाहणे, स्पर्श करणे, रस घेणे, ऐकणे, वास घेणे, यांनी जे सुखदायक होते ते शुभ.

**(शुभा)**–स्त्री., वनस्पति० श्वेतदूर्वा (रा. ८.२३०) द्र० 'दूर्वा'
पांढरी दूर्वा. पहा 'दूर्वा.'
**शमीभेदः** (रा. ८.१५५) द्र० 'शमी'
शमीचा प्रकार. पहा 'शमी'.
**पाठा** (ध. १.७०) पहाडमूळ.
**वंशरोचना** (चचि. ८.१४५; र. २७.५२; ध. २.५५)
वंशलोचन.
**गोरोचना** (र. २७.५२; रा. १२.३३) गोरोचन.
**प्रियङ्गुः** (रा. १२.२९) गव्हला.

**–करी**–स्त्री., वनस्पति० शमी (रा. ८.१५२) शमी.

**–कर्मन्**–न., दोषशमनं कर्म (अहृसू. ९.२२)
दोषशमनाचे कर्म.

**–गन्धक**–न., भैषज्य० बोलम् (रा. ६.११७) बोळ.

**–द**–पु., वनस्पति० पिप्पलः (ध. ५.७९) पिंपळ.

**–पत्रिका**–स्त्री., वनस्पति० शालिपर्णी (रा. ४.११५)
सालवण.

**शुभ्र**–न., खनिज० रौप्यम् (ध. ६.५) रुपे, चांदी.
**कासीसम्** (र. १३.१७९) हिराकस.
**लवण० साम्भरलवणम्** (रा. ६.४७) सांबरलोण.
**वनस्पति० उशीरम्** (रा. १२.२७) काळा वाळा.
**पद्मकम्** (रा. १२.१४९) पद्मकाष्ठ.
**अभ्रकम्** (धपरि. ६.३) अभ्रक.

**(शुभ्रा)**–स्त्री., आहारद्रव्य० शर्करा (ध. २.१०४)
साखर.

वंशरोचना ( ध. २.५५ ) वंशलोचन.

**-कुष्ठ**-न., रोग० श्वेतकुष्ठम् ( र. २६.३३ ) पांढरे कुष्ठ, कोड.

**-गौर**-पु., वनस्पति० सर्षपः ( ध. ४.४२ ) पांढरी मोहरी.

**-पुष्प**-पु., वनस्पति० खसखसः खस्तिलः ( ध. ६.१२० ) खसखस.

**-मरिच**-न., वनस्पति० मरिचम् ( ध.२.९० ) मिरे.

**शुभ्रवी**-स्त्री., वनस्पति० कुडुहुञ्ची ( रा. ७.२८० ) एक वनस्पती. प्रत्येक पानाजवळ लहान फळे येणारी कारल्याची जात.

**शुभ्रांशु**-पु., वनस्पति० कर्पूरः ( रा. १२.५६ ) कापूर.

**शुभ्रालु**-पु., वनस्पति० महिषीकन्दः, गुणाः-कटुरुष्णो रुच्यो महासिद्धिकरः सितः कफवातामयघ्नो मुखजाड्यहरश्च ( रापरि. ७.३३ )
पांढरा आलू. तिखट, उष्ण, रुचकर, कफवाताचे रोगनाशक. तोंडाचा जडपणा नाहीसा करणारा व कायिक वाचिक व मानसिक गुणांचा उत्कर्ष करणारा आहे.

**शुल्ब**-न., खनिज० ताम्रम् ( र. ५.५९; र. १.४१; ध. ६.९ ) तांबे.

**-नाग**-न., ताम्रनागयोः संस्कारविशेषेण मेलनम्, समभागमाक्षिकेण मारितं ताम्रं पञ्चमित्रसंस्कारेण समुत्थितं कुर्यात् । एवं दशवारं कृत्वा तद्वन्मारितं विशुद्धं नागमित्येतदुभयं मिथः समं चतुष्पलमितं गृहीत्वा पुनः समभागेन नीलाञ्जनेन मारितं पञ्चमित्रसंस्कारेण पुनरुत्थापितं कुर्यात् । एवं सप्तवारं मारणपूर्वकोत्थापनेन संशुद्धमेतद्द्रव्यद्वन्द्वं शुल्बनागमित्यर्थः ( र. ८.१८-१९ )
तांबे सिसे. तांबे व सिसे एकमेकात एका प्रक्रियेने मिसळविणे. तांब्यात समभाग सुवर्णमाक्षिक घालून त्याचे भस्म करावे. पंचमित्रसंस्कार करून पुन्हा ते जिवंत करावे व पुन्हा मारावे असे दहा वेळा भस्म करावे, याचप्रमाणेच शिसेही मारावे, नंतर तांबे व शिसे यांचे भस्म समभाग सोळा तोळे घेऊन समभाग नीलांजनाने मारावे. पंचमित्राने सात वेळ जिवंत करून मारावे अशी शेवटी जिवंत केलेली अति शुद्ध तांबे शिसे यांची जोडी शुल्बनाग या नावाने ओळखली जाते.

**शुषा**-स्त्री., वनस्पति० कासमर्दः ( चसू. २७,८८ ) कासविंदा.

**शुषिरस्नायु**-स्त्री., शारीर० सच्छिद्रस्नायुः, सुषिरा स्नायव आमपक्वाशयान्तेषु बस्तौ च विद्यन्ते ( सुशा. ५.३२ )
पोकळ स्नायु. आमाशयादींचे; सच्छिद्रस्नायु-आमाशय लघ्वंत्र बस्ती गुद यांच्या टोकाचे.

**शुष्क**-वि., अनार्द्रम् ( असंशा ११.५ ) सुकलेले, वाळलेले, ओले नसलेले.

**(शुष्का)**-स्त्री., रेवतीग्रह० रेवतीविंशतिनाम्नामेकतमं नाम ( काबालग्रहचिकित्सा० )
रेवतीबालग्रह. वीसपैकी एक.
**योनिव्यापद्**० ( चसू. १९.४ ( ९ ) ) व्यवायकाले वेगान् रुन्धन्त्याः प्रकुपितोऽनिलो विण्मूत्रसंगार्तिं योनिमुखस्य च शोषं कुर्यात्सा शुष्का योनिः ( चचि. ३०.३२; असंउ. ३८ )
संभोगाच्या वेळी मळमूत्राचे विसर्जनाचे आलेले वेग अडवले-रोकले तर वायु प्रकुपित होऊन मळ, मूत्र यांचा अवरोध, वेदना व योनि सुकट—सुकलेली करतो ती शुष्का.

**-कण्डू**-स्त्री., लक्षण० शुष्ककण्ड्वा पीडितो रुग्णः शयनेऽङ्गानि घर्षति रोदिति मर्दनमिच्छति च ( कासू. २५.३० )
सुकी खाज. कोरड्या खाजेने पिडलेला रोगी आंथरुणावर आंग घासतो, रडतो. अंग रगडून घेण्याची इच्छा करतो.

**-कास**-पु., रोग० कफादिनिष्ठीवनरहितः कासः ( अहसू. ६.६५;चनि. १.२१ ) द्र० 'कास'
सुका खोकला. ज्यात कफाचा बेडका येत नाही असा. लक्षण० ( चनि. १.२१ )

**-चूर्णित**- वि., आदौ शुष्कः पश्चाच्चूर्णितः ( चचि. १(३).३ )
वस्तु अगोदर सुकवून व नंतर जिचे चूर्ण केले आहे ती.

**-च्छर्दि**- स्त्री., लक्षण० शुष्का च असौ छर्दिः, वातज्वरस्यैकं लक्षणम् (चनि.१.२१) द्र० 'छर्दि'
सुकी ओकारी, कोरडी ओकारी. पहा 'छर्दि'. वातज्वराचे एक लक्षण.

**-द्रव्यमान**-न., पलादिमानम् ( सुचि. ३१.७; चक. १२.९८ )
शुष्क द्रव्य मोजण्याचे पल ( ४ तोळे ) इ० प्रमाण.

**–पाण्डु**–पु., रोग० वातजपाण्डुः ( र. १९.७९-८४ ) द्र० ' पाण्डु '
वातज पांडुरोग.

**–मांस**–न., **आर्द्रतारहितं मांसम्, गुणाः–तच्च अरोचकं गुरु प्रतिश्यायकृच्च** ( सुसू. ४६.१२७ )
सुके मांस. ओलावा नसलेले मांस. ते चवनाशक जड व पडसे करणारे.

**–मूलकयूष**–पु., **शुष्कमूलकानां यूषः, स च हिक्का-श्वासनिवारणः कफग्रहण्यां च शस्तः**
( चचि.१७.९९; चचि. १५.१४४ )
सुकलेल्या मुळ्यांचा कट, कढण, काढा, सार. तो उचकी व श्वासनाशक आहे.

**–रेवती**–स्त्री., रेवतीग्रह० **सा जातहारिणी;** (का. क. रेवती ) **तया आविष्टस्य लक्षणानि–पुरीष-द्रवता, पुरीषहरीतत्वं, क्रमेण सर्वाङ्गक्षयः, केशशातोऽन्नद्वेषः स्वरदैन्यं वैवर्ण्यं रोदनमुदरे ग्रन्थयः सिराश्च दीर्घकालानुवर्तनं गृध्रगन्धित्वम्** ( असंउ. ३ )
शुष्क रेवती ग्रह. जन्मतः मुलाला मारते. तिने धरल्याची लक्षणे–मळ पातळ, हिरवा; क्रमाने सर्व अंग क्षीण होणे, केश गळणे, अन्नाचा तिटकारा, स्वर दीनवाणा, वर्ण बिघडणे, रडणे, पोटात गांठी व पोटावर मोठ्या बारीक शिरांचे जाळे व गिधाडा-सारखी अंगाची घाण ही लक्षणे दीर्घकाळ राहणारी असतात.

**–शाक**–न., **आहारद्रव्यम्, शुष्कं शाकम्; तच्च प्रकृत्या गुरु** ( चसू. ५.१० ) **रूक्षदेशजं शाकमित्येके** ( चचि. १९.३३ )
सुकलेली भाजी. ही स्वभावतः जड. रूक्ष देशातील भाजी असे एक मत.
**वनस्पति० कासमर्दः** ( चचि. १९.३३ ) कासबिंदा.
**शुष्कवार्ताककचरिकादि** ( हे. अहृसू. ६.३४ )
वाळलेल्या वांग्याच्या काचोऱ्या–काचऱ्या इत्यादी.

**–स्तनी**–वि., **शुष्कौ स्तनौ यस्याः सा** ( कासू. १९ )
स्तनात दूध नसलेली किंवा स्तन सुकलेली.

**शुष्काक्षिपाक**–पु., नेत्ररोग० **तल्लक्षणानि–नेत्रं निमीलितं कठिनरूक्षवर्त्म, विलोकने आकुलदर्शन-मुन्मेषेऽतिकठिनं भवति, स साध्यः** (सुउ. ६.१२६; असंउ. १८ )
डोळा मिटलेला. कठिण रूक्ष पापण्या. गढूळ दिसणे, डोळे उघडताना अतिशय त्रास होतो. हा साध्य आहे.

**शुष्कान्न**–न., **पिष्टान्नादि तदग्निमान्द्यकरम्** ( सुसू. ४६.४९७ )
पिठूळ अन्नपदार्थ. हे अग्निमांद्यकर असतात.

**शुष्कार्शस्**–न., रोग० **अर्शोभेदः** ( चचि. १४.१६९ ) द्र० ' अर्शस् '
सुकी मूळव्याध. मूळव्याधीचा प्रकार. रक्त नसलेली मूळव्याध.
नेत्ररोग० **नेत्रवर्त्मनि संभूतोऽन्तरेषु खरः स्तब्धो दीर्घोऽर्शोवदङ्कुरश्च भवति, स साध्यः** (सुउ. ३.१४)
डोळ्यांतील सुका कोंब. डोळ्याच्या पापणीच्या आत खरखरीत; लांब, न हालणारा, मूळव्याधीसारखा अंकुर–मोड–कोंब.

**शुष्काशुष्क**–न., भैषज्य० **समुद्रफेनम्** ( धनि. ३.१५४ )
समुद्रफेस.

**शुष्कास्र**–न., **शुष्कं च तद् अस्रं नाम रुधिरम्** ( अहृसू. २९.५२ )
सुकलेले रक्त.

**शूक**–पु., शालि० ( अहृसू.६.२ ) साळ, तांदूळ.
धान्य० **धान्यशूकम्, 'कूस' 'कुसळ' इति मराठी भाषायाम्** ( असंउ. २५; अहृसू. ३०.११ )
धान्यावरचे कुसळ, कूस.
जन्तु० **सजन्तुजलमलः** ( सुनि. १४.१ ) **विषजन्तुः** ( मा. ) **ऊषरजलेषु बाहुल्येन दृश्यमानः कश्चि-दौषधिविशेषः । स सविषनिर्विषभेदाद्‌द्विधा । तत्र विषवान् रोगकारकः** ( असंउ. ३८ )
जंतुयुक्त पाण्यातील मळ. विषारी जंतु, क्रमि. खाऱ्या जमिनीत पुष्कळ प्रमाणात दिसणारी एक औषधि. ती विषारी, बिनविषारी अशी दोन प्रकारची. विषारी रोगकारक.
रोग० द्र० **'शूकदोष'** ( सुनि. १४.३ )
रोग. पहा ' शूकदोष'
योग० **मेढ्रवृद्धिकरः कामसूत्रादौ वात्स्यायनाद्युक्तो योगः** ( चचि. ३०.१६७ )
एक औषधियोग. शिश्नाची वाढ करणारा योग. कामसूत्रात वात्स्यायन इत्यादींनी सांगितलेला.

**–क्रिमिशूक**–पु., **शूकवतां क्रिमीणां शूकः, आगन्तु शोथकारणम्** ( चसू. १८.४ )
कुसळे असलेल्या क्रिमींची कुसळे अंगाला लागली तर ही सूज उत्पन्न करतात. आगंतु सुजेचे ते कारण होय.

-ज-पु., भैषज्य० यवक्षारः ( ध. २.१७ ) जवखार.
न., धान्य० शूकधान्यम् ( अहसू. ६.५ )
कुसळे असलेले धान्य.

-तुण्डविष-पु., प्राणि० जङ्गमविषविशेषः सूक्ष्मतुण्डोच्चिटिङ्गवरटीशतपदीशूकवलभिकाश्रृङ्गिभ्रमराः शूकतुण्डविषाः ( सुक. ३.५ )
एक प्राणीविष, गांधीलमाशी, गोम, खेकडा, घुले, भुंगा इत्यादी प्राणी नांगी व तोंडाच्या ठिकाणी विषारी आहेत.

-दूषित-वि., शूकेन दुष्टिं नीतम् ( सुनि. १४.१० )
कुसळे टोचल्याने दुष्ट झालेले-बिघडलेले.

-दोष-पु., शेफसो वृद्धिकराणां योगानामतियोगाद्दुर्योगाद्वा जायमानो रोगः, शूकनिमित्ता व्याधय एव शूकदोषाः कथ्यन्ते ( सुनि. १४.१ )
रोग० शूकलिङ्गवृद्धिमिच्छतामक्रमप्रवृत्तानां शूकदोषनिमित्ताः दश चाष्टौ च व्याधयो जायन्ते। तद्यथा-सर्षपिकाऽष्ठीलिका ग्रथितं कुम्भीकाऽलजीमृदितं संमूढपिडकाऽवमन्थः पुष्करिकास्पर्शहानिरुत्तमा शतपोनकस्त्वक्पाकः शोणितार्बुदं मांसार्बुदं मांसपाको विद्रधिस्तिलकालकश्चेति ( सुनि. १४.३ )
शिश्न जाड व लांब करणाऱ्या योगांचा अति उपयोग किंवा दुरुपयोग केल्याने झालेला रोग. तसेच कुसळांच्या स्पर्शाने म्हणजे शरिरात गेल्याने होणारे रोग. त्यांची नावे मुळात वर आहेत. १८ रोग.

-दोषनिदान-न., अध्यायसंज्ञा० ( सुनि. १४.१ )
अध्यायाचे नाव. कुसळांच्या दोषांच्या परिणामांची रोगांची माहिती यांत आहे.

-धान्य-न., शूकयुक्तं धान्यम् ( चसू. २७.६; अहसू. ६.१ )
कुसळे असलेले धान्य.

-निपातन-न., शूको नाम लिङ्गवृद्धिकरं सविषकीटशूककृतं लेपादि, तस्य निपातनं प्रयोगः। शूकनिपातनात्प्रकुपिता दोषा मेढ्रे श्वयथुं कुर्वन्ति ( सुनि. १२.७ )
शूक म्हणजे लिंगाची वाढ करणाऱ्या विषारी किडयांच्या कुसळ्यांच्या केलेल्या लेप इत्यादिकांचा उपयोग. शूक लावल्याने वाढलेले दोष शिश्नावर सूज निर्माण करितात.

-पत्र-पु., निर्विषसर्प० ( सुक. ४.३४(४)
एक निर्विष सर्प.

-पूर्णगलास्यता-स्त्री., लक्षण० शूकपूर्णो गल आस्यं च यस्य तस्य भावः; गले आस्ये च शूकैर्वेधनवद् वेदना ( चचि. १८.५ )
गळ्यात व तोंडात कुसळे पूर्ण भरली आहेत असे वाटणे. तोंडात व गळ्यात कुसळे टोचतात अशा वेदना होणे.

-वृन्त-पु., सविषकीट० विश्वम्भरभेदः (सुक. ८.३३) द्र० 'विश्वम्भर'
विषारी किडा. विश्वंभर किड्याचा प्रकार. पहा 'विश्वंभर'

-वृन्तविष-न., शूकवृन्तकीटस्य विषम्, तच्चिकित्सा-तगरं कुष्ठमपामार्गस्तथैव भृङ्गस्वरसपिष्टा कृष्णवल्मीकमृत्तिका ( सुक. ८.५४ )
शूकवृंत या नावाच्या किड्याचे विष. उपचार— तगर, कुष्ठ, आघाडा, माका यांच्या रसात कालवलेली काळ्या मातीच्या वारुळाची माती.

-शिम्बी-स्त्री., वनस्पति० कपिकच्छूः (रा. ३.२०१)
खाजकुहिली. कुसांची कुहिली.

शूकर-पु., पशु० वराहः, वन्यशूकरः ( अहसू. ९.२८ ) शूकरबस्तिर्बस्तियन्त्रार्थं प्रशस्तः ( सुचि. ३७.१०७ )
डुकर. रानडुक्कर. रानडुक्कराचा मूत्राशय बस्ति देण्याचे यंत्र बनविण्याकरिता उपयुक्त.

( शूकरी )-स्त्री., वनस्पति० वाराहीकन्दः ( चचि. ९.४६ )
डुक्करकंद.

-दंष्ट्रक-पु., क्षुद्ररोग० सदाहो रक्तपर्यन्तस्त्वक्पाकी तीव्रवेदनः कण्डूमान् ज्वरकारकश्च अयं 'वराहदाढ' इति लोके प्रसिद्धः ( मा. )
एक छोटासा रोग. लाल कडायुक्त चकंदळे. ह्यांची आग होते. तीव्र वेदना, खाज ताप असतात व त्वचा पिकते, 'डुक्करदाढ' या नावाने लोकात प्रसिद्ध.

-दंष्ट्रा-स्त्री., वराहस्य दंष्ट्रा; मधुघृतयुक्ता व्यङ्गन्यच्छनीलिकासु लेपार्थमुपयुज्यते ( सुचि. २०.३६; असंउ. ३७ )
डुक्कराची दाढ. वांग ( तोंडावरचे काळे डाग ) निळी (इतरत्र असलेलेले काळे डाग) व पांढरी, काळी, गोल चकंदळे यांवर लेपाकरिता उपयुक्त.

-वसा-स्त्री., वराहमांसस्नेहः ( चसू. २६.८४ )
डुक्कराची चरबी.

**–व्रीहि**–पु., धान्य० **व्रीहिभेदः** ( अहसू. ६.९ ) द्र० **'व्रीहि'**
व्रीहि जातीच्या तांदळाचा प्रकार. पहा 'व्रीहि'.

**शूकराक्षिता**–स्त्री., **अधोदृष्टित्वम्, व्यधदोषभवो रोगः, असौ अहिताचारादपि भवति** (सुउ. १७.८५-८६)
डुकराच्या डोळ्यासारखी खाली दृष्टि असणे. हा विकार डोळ्यावर केलेल्या शस्त्रक्रियेने किंवा अहितकर खाणे, पिणे, वागणे यांनी होतो.

**शूकरास्थिक्षार**–पु., क्षार० **हस्तिमेहे पानार्थमुपयुज्यते** ( सुचि. ११.९ )
डुकराच्या हाडांचा क्षार, चुना. हस्तीमेहावर पिण्याकरिता उपयोगी.

**शूकाजीर्ण**–न., **न पुनः पुनर्दुरवचारितशूकविकृतिरूपमेवाजीर्णम्** ( सुनि. १४.११ )
पुनः पुनः शूकाचा दुरुपयोग केल्याने झालेले विकृतिरूपी अजीर्ण.

**शूद्र**–पु., सर्प० **लक्षणम्–महिषीद्विपिवर्णः परुषत्वग्भिन्नवर्णश्च, अत्र सर्पेषु परिकल्पितं शूद्रत्वं केवलं सर्पभेदाभिप्रायकमिति ज्ञेयम्** (सुक. ४.२८ )
सर्पाची एक जात. म्हशीच्या रंगाचा व ठिपके असलेल्या वाघाच्या रंगासारखा. येथील शूद्रत्व केवळ सर्पप्रकाराचा अभिप्रायदर्शक समजावे.

**–प्रिय**–पु., वनस्पति० **पलाण्डुः** ( रा. ७. १०० )
कांदा.

**शून**–वि., **शोथयुक्तम्** ( चसू. २६.४३(२); सुचि. २३.९ )
सूज असलेला, सूजयुक्त.

**( शूना )**–स्त्री., योनिरोग० **शोथयुक्ता ( गर्भिणी )** ( काचि. गर्भिणीचि. ) **अन्तर्मुखी, सूचीमुखी योनिः** ( चचि. ३०.८२ )
योनीचा एक रोग. निमुळत्या, संकुचित, लहान तोंडाची योनि व आत वाकडी झालेली योनि.

**–गुह्योदर**–वि., **शोफयुक्तं गुह्यमुदरं च यस्य** ( चइ. ६.१४ )
गुह्यभाग व उदर ज्याचे सुजले आहे असा रुग्ण.

**–ता**–स्त्री., लक्षण० **उच्छूनता, उत्थितत्वम्, अन्तर्मृते शिशौ लक्षणमेकम्** ( सुनि. ८.१२ )
सूज असणे. पोट उचललेले, वर आलेले असणे. पोटातच गर्भ मेला तर हे लक्षण येते.

**–पाद**–वि., **शोफयुक्तः पादो यस्य, सः** ( चइ. ६.१४ )
सुजलेल्या पायाचा. ज्याच्या पायाला सूज आहे असा.

**–पादकर**–वि., **शोफयुक्तौ पादौ करौ च यस्य सः** ( सुउ. ४०.१७४ )
हातांपायांवर सूज असलेला.

**–पायु**–वि., **शोफवान्पायुर्यस्य सः** ( अहसू. १९.५ )
ज्याच्या गुदाला सूज आहे असा. सुजलेल्या गुदाचा.

**–रसन**–वि., **उच्छूनजिह्वः** ( असंउ. ४३ )
सुजलेल्या जिभेचा. सुजलेली जीभ असलेला.

**–वृषण**–वि., **शूनौ वृषणौ यस्य सः** (असंशा. ११.१७)
वृषण सुजलेला.

**–संकाश**–वि., **शूनवत् प्रतीयमानः, शूनतुल्यः** ( चइ. ८.१० )
सुजेसारखा.

**–हस्त**–वि., **शूनौ हस्तौ यस्य सः** ( चइ. ६.१४ )
हातांना सूज असलेला.

**शूनाक्ष**–वि., **शूने अक्षिणी यस्य सः** ( चचि. १३.५२ )
डोळ्यांना सूज असलेला.

**शूनाक्षिकूट**–वि., **शोफयुक्तोऽक्षिकूटो यस्य** ( चचि. १६.१५ )
डोळ्यांच्या खोबणींना सूज असलेला.

**शून्य**–वि., **अधिवस्तुभिर्मनुष्यै रहितम्** ( **गृहादि** ) ( असंउ. ३.४६ )
सामान सुमान व माणसे यांनी रहित असलेले, अभावाचे, घर इ० रिकामे.

**( शून्या )**–स्त्री., वनस्पति० **नलिका** (ध. ३.४३) गुलछबू.

**–गृह**–न., **जनरहितं गृहम्** ( असंसू. ३.४६ )
निर्मनुष्य घर.

**–ता**–स्त्री., लक्षण० **मस्तकादौ संविदभावः** ( चसू. १७.३१ )
संवेदनांचा अभाव.
**रिक्तत्वम्** ( अहसू. ११.१६ )
रिकामेपणा. कफाशयात कफ नसणे.

**–त्व**–न., **रिक्तत्वम्** ( अहसू. ११.१६ )
रिकामेपणा. कफाशयात कफ नसणे.

**–देह**–वि., **रिक्तो देहः शक्तिहीनो देहः यस्य सः** (चसि. १२.४)
निर्बल शरिराचा.

**–मध्य**–पु., वनस्पति० **नलः** ( ध. ४.१४१ ) नळ.

**-शरीर**-वि., बलहीनदेहः ( असंशा. ३ )
बलहीन शरिराचा, शरीर पोकळ भासणारा.

**-शरीरा**-वि., प्रजाता स्त्री, गर्भव्यपगम एव शरीरशून्यत्वे हेतुः । तथा प्रवाहणवेदनाक्लेदरक्तनिःस्रुतिश्च विशेषेण हेतुः ( चक्र.चशा. ८.४९ )
रिकामी स्त्री म्हणजे बाळंतीण ( गर्भविरहित ) गर्भ आणि गर्भजल व रक्तस्राव यांनी रिकामी झालेली.

**-हृदय**-न., लक्षण० विचाररहितं मनः हर्षामर्षादिविकाररहितमन्तःकरणम् ( चचि. ९.६ )
विचाररहित मन. आनंद क्रोध विकाररहित अंतःकरण.

**शून्यागार**-न., निर्जनगृहम् ( सुशा. १०.४६; सुचि. २४.९१ )
निर्मनुष्य–निर्जन घर.

**शून्याटवी**-स्त्री., शून्यारण्यम् ( असंशा. १२.१९ )
शून्य अरण्य. निर्मनुष्य–निर्जन अरण्य.

**शूर**-वि., विषादरहितः ( सुसू. ३४.२० )
शूर, योद्धा, प्रतिकारक्षम.
पु., वनस्पति० सर्जकः (ध. ५.१२३) राळ.
लकुचः ( रापरि. ९.४४) क्षुद्र फणस, ओट.
मसूरिका ( रा. १६.१४९ ) मसूर.
चित्रकः ( रा.६.१२५ ) चित्रक.

**-सेनक**-पु., ऋषि० रससिद्धिप्रदायकः रसरत्नसमुच्चयकारेण प्रकीर्तितेषु सप्तविंशतिरसप्रदायकेष्वेकः ( र.१.१-२ )
पाऱ्याची सिद्धि देणारे २७ रसतज्ज्ञांपैकी एक ऋषी.

**शूर्प**-पु., मान० द्रोणद्वयम् ( चक. १२.९६; असंक. ८.१६९ )
माप, तोल, दोन द्रोण.
पात्र० वंशनिर्मितं धान्यात्तुषमृत्तिकादिनिरसनोपयोगि दीर्घायतं पात्रम्, 'सूप' 'झलिया' इति लोके ( असंउ. १; र. ७.२२ )
सूप. बांबूचे केलेले. धान्यातील टरफले खडा माती इत्यादी काढून टाकण्याकरिता लांब व पसरट असे साधन.

**-पर्णी**- स्त्री., वनस्पति० मुद्गपर्णी ( ध. १.१३८; असंउ. १५ )
रानमूग.

**-पर्णीद्वय**- न., वनस्पति० मुद्गपर्णी माषपर्णी च ( चचि. १.४३ )
रानमूग, रानउडीद, अशी जोडी.

**शूल**-पु., लक्षण० रुजा ( चसू. १४.१३ ) मज्जास्थिगतस्य कुपितानिलस्यैकं लक्षणम् ( चचि. २८.३३ ) सर्वशूललक्षणेषु वायुरेव प्रधानं कारणम्, (मा.)
शूळ, वेदना. मज्जा व अस्थिगत दुष्ट वाताने होणारे लक्षण. सर्व शूलात वायु हाच मुख्य कारण होय.
रोग० शङ्कुस्फोटनवत्तस्माच्छूलासक्तस्य तीव्रा वेदना भवति तस्माच्छूलमिहोच्यते ( सुउ. ४२.८१ ) शूलरोगोत्पत्तिकथा–पुरा मदननाशाय कुपितो हरः शूलं मुमोच । तं प्राणहरं शूलमागच्छन्तं दृष्ट्वा भयाक्रान्तोऽनङ्गस्त्राणार्थं विष्णुशरीरं प्रविवेश । ततः स शूलो विष्णुमेव प्रहर्तुं यावद्गच्छति तावद्विष्णुहुङ्कारमहिम्ना तत्रैव भूमौ पपात । ततोऽनन्तरं पञ्चभूतात्मकं शरीरं प्रविश्य तदेव दूषयन् शूलरोगः सञ्जातः । (मा.) हेतुसंप्राप्तिः– वातमूत्रपुरीषनिग्रहातिभोजनाजीर्णाध्यशनायासविरुद्धान्नसेवनानि

क्षुत्काले पानीयपानं विरूढसेवनं पिष्टान्नशुष्कमांसानां तथैवंविधानां द्रव्याणां सेवनात् शूलो जायते ( सुउ. ४२.७७-८० ) संख्या–वातजपित्तजकफजसंनिपातजामजपरिणामशूलान्नद्रवाख्यशूलाश्चेत्यादयः शूलप्रकारा भवन्ति । तत्रापि परिणामशूलः कफजवातजपित्तजकफजद्वन्द्वजसंनिपातजभेदात्सप्तधा । तत्र वातशूलः–अतिव्यायामयानमैथुनेभ्यः प्रजागराच्छीतजलातिपानात् कलायमुद्गकोरदूषादिभक्षणादतिरूक्षाशनात् कषायतिक्तातिविरूढजान्नाद्विण्मूत्रशुक्रानिलवेगरोधात् शोकोपवासादतिहास्याद्भाषणाद्वा प्रवृद्धो वायुः पार्श्वपृष्ठहृत्त्रिकबस्तिप्रदेशेषु शूलं जनयति । जीर्णे प्रदोषे घनागमे शीते च स सुतरां गाढं कुप्यति । अयं मुहुर्मुहुरुपशमं प्राप्नोति प्रकुप्यति च । संस्वेदनाभ्यञ्जनमर्दनैः स्निग्धोष्णभोज्यैश्च शमं याति । पित्तजशूलः–अतिक्षारोष्ण विदाहि तैलनिष्पावकुलत्थसौवीरयूष सुराविकारसेवनैरतिकट्वम्लपदार्थभोजनेन क्रोधेनायासेन सूर्यातपेन मैथुनातियोगाद्वा प्रकुपितं पित्तं नाभ्यां तृण्मोहदाहार्तिकरं स्वेदमूर्च्छाभ्रमचोषयुक्तं शूलं करोति ।

विशेषतश्च मध्याह्नेऽर्धरात्रे शरदृतौ भक्षितवतो विदाहकाले च पीडां करोति । किं तु शीतस्वादुभोजनैश्च प्रशाम्यति । कफजशूलः–आनूपमांस-

जलचरमांसकिलाटपयोविकारैर्मांसेक्षुपिष्टकृशरातिलशष्कुलीसेवनेनान्यैश्च बलासजनकैर्हेतुभिश्च प्रकुपितः श्लेष्माऽऽमाशये शूलं करोति। तेन च हृल्लासः कासः सदनमरुचिर्लालास्रावो बद्धकोष्ठता शिरोगुरुत्वमित्यादीनि लक्षणानि भवंति। सूर्योदये शिशिरे वसन्ते भुक्ते सति चायं पीडां करोति। सांनिपातिकशूलः—एतत्सर्वलक्षणसमन्वितो भवन्ति। परिणामशूलः—यदा स्वैर्निदानैः प्रकुपितो वायुः कफपित्ते व्याप्य संनिहितस्तिष्ठेत्तदा स परिणामशूलं जनयति। सामान्यलक्षणानि—आहारे पच्यमाने यच्छूलं तदेव परिणामजं जानीयात्। वातिकपरिणामशूलम्—आध्मानाटोपविण्मूत्रबन्धनारतिवेपनयुक्तं स्निग्धोष्णोपशमप्रायं विजानीयात्। पैत्तिकं तु परिणामशूलं तृष्णादाहारतिस्वेदोपेतं कट्वम्ललवणैर्वृद्धं शीतशमप्रायं च विद्यात्। कफजस्तु छर्दिहृल्लाससंमोहोपेतः स्वल्परुग्दीर्घसन्ततिः कटुतिक्तोपशान्तश्च भवति। संसृष्टलक्षणैर्द्वन्द्वजं परिणामशूलं लक्षयेत्। त्रिदोषजं तु क्षीणमांसबलानलमसाध्यं विद्यात्। अन्नद्रवाख्यशूलः—पथ्यापथ्यप्रयोगेण भोजनाभोजनेन चान्ने जीर्यमाणे जीर्णेऽजीर्णे च शूलः सञ्जायते। न च कदाचिच्छमं याति। नच स्वास्थ्यमश्नुते 'वान्तमात्रे जरत्पित्तं शूलमाशु व्यपोहति'। (मा.) चिकित्सा—यस्मादत्राशुकारी पवनस्तस्मात्त्वरया तं जयेत्। तथैव शूलाभिपन्नस्य स्वेद एव सुखावहो भवति (सुउ. ४२.८८) वमनं लङ्घनं स्वेदः पाचनं फलवर्तयः क्षाराश्चूर्णानि गुटिकाः शूलनाशनाः शस्यन्ते (सुउ. ४२.१४५)

शूलरोग. शंकूने (भाला, बरची) फोडल्यासारखी तीव्र वेदना होते तिला शूल म्हणतात. **पौराणिक कथा**— पूर्वी कुपित झालेल्या शंकराने मदनावर त्याचा नाश करण्यासाठी शूल फेकला. प्राणहारक असा तो शूल येत असलेला पाहून भीतिग्रस्त मदन स्वतःच्या रक्षणासाठी विष्णूच्या शरिरात शिरला. तेव्हा तो शूल विष्णूलाच मारण्यासाठी जात आहे तोच विष्णूच्या हुंकारप्रभावाने भूमीवर पडला. तेव्हा तो पंचमहाभूतात्मक शरिरात प्रविष्ट होऊन त्यांना दूषित केले. तोच हा शूल होय. **कारणे**— वात, मूत्र, मळ यांच्या विसर्जनाचे वेग अडविण्याची सवय; अति खाणे, जेवणावर जेवण, अजीर्णावर जेवण, श्रम, परस्परविरुद्ध प्रकृति इत्यादी, विरुद्ध अन्न सेवन करणे, भुकेच्या वेळी पाणी पिणे, मोड आलेले धान्य, पिठुळ सुके मांस इत्यादींच्या सेवनाने शूल होतो. संख्या—संप्राप्ति—वात, पित्त, कफ, सन्निपात, आमज, परिणामज व अन्नद्रवाख्य शूल. **परिणाम शूल ७ प्रकार**— दोषांचे पृथक ३, संयुक्त दोन दोनाचे ३, व सन्निपाताचा १. त्या त्या दोषांचे स्वभावाच्या वरील कारणांनी त्या त्या दोषांचे शूल होतात. **वातशूल**—अति व्यायाम, वाहनातून अधिक प्रवास, अतिमैथुन, जागरण, थंड पाणी अतिशय पिणे, वाटाणे, मूग, कोद्रु, व अतिरूक्ष खाणे, तुरट-कडु रसाचे पदार्थ व मोड आलेले धान्य, अति खाणे, मलमूत्र शुक्र वायु यांच्या वेगाचा अवरोध, शोक, उपवास, हास्य, भाषण यांच्या अतिरेकाने वाढलेला वायु फासळ्या, पाठ, हृदय, माकडहाड, बस्ति यात शूल उत्पन्न करतो. पित्ताचा बेंबीजवळ, कफाचा आमाशयात होतो. **काळ—वातज**— जेवण जिरल्यानंतर प्रदोषकाळ, पावसाळ्याच्या सुरवातीच्या वेळी आणि थंड ऋतूत तो फार वाढतो. तो वारंवार वाढतो, तसाच थांबतोही. शेक, अभ्यंग, मर्दन आणि स्निग्ध व उष्ण आहाराने शमतो.

**पित्तज**—अन्न पचनाचा काळ माध्यान्ही, अर्ध्या रात्री. **कारणे**—अतिखारट, उष्ण, विदाही, तेल, पावटे, कुळीथ, कांजी, कढणे, मद्य यांचे अति सेवन. तिखट, आंबट पदार्थ अधिक खाणे, क्रोध श्रम, उन्ह, मैथुन यामुळे नाभीच्या ठिकाणी वाढलेले पित्त तहान, मोह, दाह मूर्च्छा, भ्रम, घाम, आणि घशात ओढल्यासारखी पीडा करते व शूल होतो. विशेषेकरून माध्यान्ही, अर्धरात्री, शरदऋतूत असा आहार अतिप्रमाणात घेणाराला हा शूल अधिक होतो व मधुर भोजनाने शमतो. **कफज शूल**— दलदलीच्या प्रदेशातील व जलचर प्राण्यांचे मांस, किलाट वगैरे दुधाचे पदार्थ, मांस, ऊस, पिठूळ पदार्थ, खिचडी, तीळ, करंज्या व साखरेचे इतर कफकारक पदार्थ खाल्ल्यामुळे प्रकुपित कफ आमाशयात शूळ उत्पन्न करतो. **लक्षणे**—उम्हासे, खोकला, गळाल्यासारखे वाटणे

अरुचि, लाळ गळणे, बद्धकोष्ठता, डोके जड पडणे, इत्यादी. **पीडाकाळ**—सूर्योदय, शिशिर आणि वसंत ऋतु व भोजनोत्तर पीडा. **सांनिपातिक शूळ**—हा सर्व लक्षणयुक्त असतो.

**परिणामशूळ**—जेव्हा वातवृद्धिकर आहार-विहाराने वायु कुपित होऊन कफपित्तासह पीडा करतो तो परिणामशूल होय. आहार पचत असता तो होतो म्हणून त्याला हे नाव आहे. **वातज परिणामशूळ**—पोट फुगणे, गुडगुड, मलमूत्रावरोध, बेचैनी, कंप हीं लक्षणे व स्निग्ध उष्ण उपचारांनी शमन पावतो. **पित्तज परिणाम-शूळ**—तहान, दाह, बेचैनी, घाम यांनी युक्त. तिखट, आंबट, लवण रसांनी वाढतो व शीत उपचारांनी शमतो. **कफज परिणामशूळ**—ओकारी, उम्हासे, मोह यांनी युक्त. पीडा थोडी पण सारखी चालू असते. तिखट, कडु उपचाराने बरे वाटते. **द्वंद्वज परिणामशूळ**—यात दोन दोषांची लक्षणे असतात. **सांनिपातिक परिणाम-शूळ**—ज्याचे बलमांस क्षीण झाले आहे त्याचा असाध्य असतो. **अन्नद्रवाख्य शूळ**—पथ्य, अपथ्य कसाही आहार केला तरी, जेवले न जेवले तरी, अन्न जिरत असता, जिरल्यानंतर किंवा अजीर्ण असले तरी हा शूल होतो. हा शांत होतच नाही. व रोग्याला, स्वास्थ्य मिळत नाही. परंतु वांती होताच जीर्ण पित्तशूल ताबडतोब शमतो. **चिकित्सा**—ज्या अर्थी येथे शीघ्र कार्य करणारा वायु आहे त्या अर्थी त्याला प्रथम जिंकले पाहिजे. तसेच शूलपीडित रोग्याला शेकणे सुखावह होते. वमन, लंघन स्वेद, पाचन, फलवर्ती, क्षार, चूर्ण, गुटिका ह्या शूलनाशक अशा देणे योग्य ठरते.

**( शूली )**—स्त्री., वनस्पति० **अस्याः पत्रं शूलवत्, मूलं तु धूसरमस्याः शाखा न विद्यन्ते, सा च जलाश्रया पिच्छिला महिषीप्रिया मृदुलता; गुणाः— पिच्छिलोष्णा गुरुर्गौल्या पित्तदाहहरा बल्या रुच्या दुग्धवृद्धिकरी च** ( रापरि. ८.६८ )

या वनस्पतीचे पान भाल्यासारखे असते. मूळ धूसर रंगाचे, शाखा नसतात, पाण्याच्या आश्रयाने होणारी, मऊ, बुळबुळीत वेल. **गुण**— गोड, बुळबुळीत, उष्ण, जड, बलकर, रुचकर, दूध वाढविते, पित्तदाहनाशक, म्हशीना प्रिय.

**–केसरिन्**–पु., पारदयोग० **द्विगुणेन गन्धकेन पारदं संमर्द्य त्रिगुणे ताम्रसंपुटे संरोधयेत्। ऊर्ध्वाधो लवणं दत्त्वा मृद्भाण्डे प्रक्षिप्य गजपुटे पाचयेत्। मात्रा–गुञ्जाद्वयम्; अनुपानं–पर्णखण्डं तदनु च हिङ्गुशुण्ठीवचाजीरकमरीचानामुष्णोदकेन तोलकमात्रं चूर्णं पिबेत्। फलम्– असाध्यशूलनाशः** ( र. १८.११८ )

पाऱ्याचा योग. पारा गंधक एकास दोन घेऊन कज्जली करून तांब्याच्या संपुटात घालून ते बंद करावे. वर खाली मीठ घालून मडक्यात ठेवून गजपुटात अग्नि द्यावा व चूर्ण करावे. **अनुपान**—औषध विड्याच्या पानात खाऊन हिंग, सुंठ, वेखंड, जिरे, मिरी यांचे चूर्ण ऊन पाण्याबरोबर प्यावे. मात्रा–दोन गुंजा. असाध्य शूलनाशक.

**–क्षय**–पु., **शूलापनोदः, शूलनिवृत्तिः** (अहसू. १७.१५)

शूलनाश, शूलक्षय.

**–गजकेसरिन्**–पु., पारदयोग० **पारदगन्धकहरितालान्येकद्वित्रिभागानि गृहीत्वा तेषां कज्जलीं च कृत्वा पलताम्रसम्पुटे स्थापयित्वा पिधाय च गजपुटे पचेत्। सम्पुटं तावदाकण्ठं सैन्धवेन पूरयेत्। वस्त्रगालितममुं रसं कूप्यां स्थापयेत्। कूपीं सैन्धवपूरिते भाण्डे स्थापयेत्। मात्रा–वल्लम्, फलं–शूलनाशः** ( र. १८.१५४-५६ )

पाऱ्याचा एक योग. पारा गंधक हरताळ ही एक दोन व तीन या प्रमाणात घेऊन कज्जली करून चार तोळे तांब्याच्या संपुटात ठेवून त्यांत सैंधव पूर्ण भरून बंद करून गजपुटात अग्नि द्यावा. नंतर वस्त्रगाळ चूर्ण करून कुपीत ठेवावे व कुपी सैंधव भरलेल्या भांड्यात ठेवावी. मात्रा–एक वाल. फळ–शूलनाश.

**–गुल्मादिरक्षोघ्न**–पु., **वनस्पति० हिङ्गुः**(रा. ६.५९)

हिंग.

**–घातिदशक**–न., **द्रव्यगण० शूलघ्नगणः** (असंसू. १६.२७) **शूलप्रशमनवर्गः** ( चसू. ४.१७ )

शूलघ्नदशक. शूलनाशक दहा औषधे.

**–घ्न**–वि., **शूलनाशनम्** ( अहसू. ८.१८ )

शूलनाशक.

**–घ्नवर्ग**–पु., **शूलप्रशमनवर्गः** (असंसू. १५.४४ )

शूलनाशक वर्ग.

**-चिकित्सित**-न., अध्यायसंज्ञा० ( काखिल १८. १) अध्यायाचे नाव. यात शूलाचे उपचार आहेत.

**-पत्री**-स्त्री., वनस्पति० शूली (रापरि. ८.६८) शूली.

**-पाणि**-पु., वनस्पति० शम्भुः ( असंउ. ३ ) शंकर, महादेव.

**-प्रशमन**-वि., शूलघ्नः ( चसू. ४.८ ) शूलनाशक.

**-प्रशमनवर्ग**-पु., महाकषायवर्गे प्रोक्त एको गणः, तत्र पिप्पली-पिप्पलीमूल-चव्य-चित्रक-शृङ्गवेर-मरिचाजमोदाजगन्धाजाजीगण्डीराणीति द्रव्याणि दश ( चसू. ४.१७ )
शूलनाशक वर्ग. महाकषाय वर्गांतील एक गण. पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ, मिरी, अजमोदा, तिळवण, जिरे, कडवा सुरण.

**-विश्लेषण**-न., नानाप्रकारार्तिशूलाहतगात्रस्येव वेदना ( सुसू. २२.११ )
नाना प्रकारच्या पीडा, शूलाचा आघात होतो अशा होणाऱ्या वेदना.

**-हन्त्री**-स्त्री., वनस्पति० यवानी ( रा. ६.१४१ ) ओवा.

**शूलान्तक**-पु., पारदयोग० पारदभस्माभ्रकभस्मनी प्रत्येकं पलं ताम्रभस्म द्वे पले गन्धकं पलत्रयं हरितालं विमलं स्वर्णमाक्षिकं च कर्षं, पलार्धसम्मिता लाङ्गली कन्दनागवङ्गौ पलार्धकौ चतुष्पलं त्रिवृच्चूर्णं सर्वाण्येतानि भूम्यामलकीरसेन दन्तीक्काथेन च सप्तधा भावयेत्। मात्रा-वल्लम्, अनुपानम्-आर्द्रकस्वरसः, पथ्यं-दधिभक्तम्, फलं-सर्वरोगसर्व शूलहरत्वम् ( र. १८.१३४-३८ )
पाऱ्याचा योग. पाऱ्याचे अभ्रकाचे भस्म प्रत्येकी चार तोळे, ताम्र भस्म, आठ तोळे गंधक, बारा तोळे हरताळ, विमल सुवर्ण माक्षिक एकेक तोळा, दोन तोळे कळलावी, शिसे व कथील भस्म दोन दोन तोळे, १६ तोळे तेंड ( निशोत्तर ) चूर्ण, सर्वांना भुईआवळी व दांतीच्या काढ्यांच्या सात सात भावना द्याव्या. **मात्रा**- १ वाल, **अनुपान**- आले रस. **पथ्य**- दहीभात.
**फळ**- सर्व शूल व रोगनाशक.

**शूलारि**- पु., वनस्पति० इङ्गुदी ( रापरि.८.१७ ) हिंगणबेट.

**शूलाविष्ट**-वि., शूलार्दितः ( सुउ. ४०.९ ) शूलाने पीडित.

**शूलिकाप्रोत**-वि., लोहादिशलाकारोपितम्, इदमेव शूले पक्वत्वात् शूल्यम् अभिधीयते ( सुसू. ४६.३५५-३५६ )
लोखंड किंवा इतर धातूच्या सळईवर ठेवलेले, लपेटलेले. हेच ( मांस ) सळईवर ( शूलावर ) पचवल्यामुळे त्याला शूल्य म्हणतात.

**शूलिनी**-स्त्री., वनस्पति० शूली ( र. २३.२२-२३ ) शूली.
चित्रकः ( र. २३.२२ ) चित्रक.

**शूलीक**-पु., देश० तत्रस्था जनाश्च; अयं मांसादिसात्म्यः ( चचि. ३०.३१६ )
एक देश. त्यातील लोक. ह्यांना मांसादि सात्म्य आहेत.

**शूलोद्वेष्टन**-न., शूलेन कृत्वाऽङ्गमोटनम् नाम शूलहेतुकं ( सुक. ४.३७ ) शूलाने अंग मोडणे.

**शूल्य**-न., शूलपक्वमांसम् ( अहसू. ३.२०; असंचि.७ ) सळईवर पक्व केलेले मांस.

**-मांस**-न., लोहादिशलाकारोपितमग्निना पक्वं मांसम्; हिङ्गूदके परिक्षिप्य शूले निष्पीडितं ततः पुनः पुनः सिक्त्वा जलेन विधूमेऽग्नौ प्रतापयेत्। फलाम्लेनापि पक्वं सौरभयुक्तं भवति ( सुसू. ४६.३५७ )
लोखंड इत्यादी धातूंच्या सळईला मांस लपेटून अग्नीत भाजलेले मांस. हे हिंगाच्या पाण्यात बुडवून सळईवर दाबून नंतर पाण्याने पुनः पुनः शिंपडून निखाऱ्यावर तापवावे. फळाच्या आंबट रसाने सुद्धा शिजवले तर मांस सुगंधी होते.

**शृगाल**-पु., पशु० जम्बूकः गुहाशयवर्गीयः ( सुसू. ४६.७२ )

**-मांसगुणाः**-उष्णमतिस्निग्धं गुरु बल्यं वातघ्नं च ( ध. ६.४३८ )
कोल्हा. गुहेत रहाणाऱ्यांपैकी एक. **मांसाचे गुण**— उष्ण, अतिस्निग्ध, जड, बलवर्धक आणि वातनाशक.

**( शृगाली )**-स्त्री., वनस्पति० कोकिलाक्षः ( रापरि. ४.४८ )
तालीमखाना.

**-घण्टी**-स्त्री., वनस्पति० कोकिलाक्षः ( रापरि. ४.४८ )
तालीमखाना.

**-दंश**-पु., जम्बूकदंशः, यदा श्वशृगालतरक्षुव्याघ्रर्क्षादीनां संज्ञावहाश्रितः श्लेष्मप्रदुष्टो वायुः ज्ञांसं

मुष्णाति तदा प्रस्रस्तलाङ्गूलहनुस्कन्धा अतिलाला-वन्तोऽतिबधिरा अन्धाश्चेतस्ततो धावन्ति। तेनोन्मत्तेन सविषेण दंष्ट्रिणा दष्टस्य पुरुषस्य दंशोत्तरं सुप्तता भवति, भूयान् कृष्णरुधिरास्रावो जायते, दिग्धविद्धस्य लक्षणानि च जायन्ते (सुक. ७.४३-४६)

कोल्ह्याचा दंश. कुत्रा, कोल्हा इत्यादींच्या संज्ञा-वाहिनीतील कफ दुष्ट होऊन वायूला प्रकुपित करतो. तो वायु संज्ञानाश करतो, तेव्हा त्यांची शेपटी, हनुवटी व खांदा गळालेले असतात. लाळ फार गळते. अतिशय बहिरे व आंधळे होऊन इकडे तिकडे धावतात. तो पिसाळलेला प्राणी ज्याला आपल्या विषारी दातांनी चावतो त्याला दंशाच्या भागात बधिरता येते, काळे रक्त स्रवते आणि दिग्ध विध्द लक्षणे होतात. दंशानंतर— स्पर्श कळत नाही. पुष्कळ काळे रक्त स्रवते, विषारी दंशाची लक्षणे होतात.

**-पित्त**-न., **जम्बूकपित्तम्; एतद्विषहरम्** (असंसू. ८) **अनेन कृता वर्तिर्नावनाञ्जनार्थमुपयुज्यते** (चचि. ९.६७)

कोल्ह्याचे पित्त. हे विषहर आहे. त्याने केलेली वात—कांडी अंजन व नस्य याकरिता उपयोगी.

**-मुख**-न., **स्वस्तिकयन्त्र० अष्टादशांगुलप्रमाणमिदं शृगालमुखसदृशं यन्त्रम्** (सुसू., ७.१०)

कोल्ह्याच्या तोंडासारखे यंत्र. स्वस्तिकयंत्राचा प्रकार.

**-विन्ना**-स्त्री., **वनस्पति० पृश्निपर्णीभेदः** (ध. १.९०; सुउ. ४२.११३)

पिठवणाचा प्रकार.

**-विष**-न., **जम्बूकविषम्; तल्लक्षणानि—व्यालविषवत् कण्डूनिस्तोदवैवर्ण्यादीनि भवन्ति** (असंउ. ४६)

कोल्ह्याचे विष. लक्षणे—वाघाच्या विषासारखी खाज, टोचणी, वर्णात बिघाड इत्यादी होतात.

**-शाव**-पु., **शृगालस्य बालः; अस्य मांसं यक्ष्मिणे हितं भवति** (चचि. ८.१५२)

कोल्ह्याचे पिल्लू. याचे मांस क्षयरोगावर हितकर.

**शृगालिका**-स्त्री., **वनस्पति० विदारी** (ध. १.१४७)

भुईकोहळा.

**पृश्निपर्णी** (रा, ४.११७) पिठवण.

**शृङ्खलाबन्ध**-पु., **पारदबन्ध० हीरकेण मारितेऽन्यस्य पारदस्य निक्षेपः, वज्रादिमारितोऽवज्रादिमारितश्चेति पारदद्वयमपि एकत्रीकर्तव्यम्** (र. ११.८०)

एक पाऱ्याचा बंध. गोळी. हिऱ्याने मारलेल्या पाऱ्यात तदितर धातु इ० मारलेला दुसरा पारा घालणे व गोळी करणे.

**शृङ्खलारणक**-पु., **वनस्पति० कोकिलाक्षः** (रापरि. ४.४८)

तालीमखाना.

**शृङ्खलावात**-पु., **रोग० तत्र लक्षणानि—देहः शुष्कपाण्डुः निद्रानाशः, शिरोव्यथा वान्तिर्हिक्का विस्फोटश्चेति** (र. २१.१४७-४८)

एक वात रोग. लक्षणे-शरीर सुकलेले, पांढरे, झोपेचा नाश, डोकेदुखी, वांती, उचकी आणि फोड.

**शृङ्खलिका**-स्त्री., **वनस्पति० कोकिलाक्षः** (रापरि. ४.४९)

तालीमखाना.

**शृङ्ग**-पु., **तन्त्रकार० रसरत्नसमुच्चयकर्त्रा सिंहसूनुगुप्तेनाऽऽलोचितस्तन्त्रकर्ता** (र. १.५-९)

रसरत्नसमुच्चयकर्ते सिंहसूनुगुप्त यांनी पाहिलेला ग्रंथकर्ता.

न., **विषाणम् प्राणिजद्रव्येष्वेकम्** (चसू. १.६९)

शिंग.

न., **यन्त्र०** (चचि. ८.८२; सुसू. १३.५) **शृङ्गं तु ह्रस्वमध्यदीर्घमष्ट दशद्वादशाङ्गुलायतं त्र्यङ्गुलप्रवेशमुखमग्रे सर्षपोपमच्छिद्रं तनुचर्मनद्धं चूचुकाकारं च। तद्वातविषरक्ताम्बुदुष्टस्तन्यचूषणार्थम् उपयुज्यते** (असंसू. ३४.१४; अहसू. २५.२६)

शिंग. एक यंत्र. लहान मध्यम व मोठे असे तीन प्रकारचे असावे. आठ दहा किंवा बारा अंगुळे लांब पुढे तीन अंगुळे प्रवेशाकरिता तोंड असावे. मोहरीएवढे छिद्र ठेवावे व पातळ कातड्याने लपेटलेले, स्तनासारखे असावे. ते वात, विष, रक्त, पाणी, वाईट दूध चोखण्याकरिता उपयोगी.

**शृङ्गी**-स्त्री., **कीट० वायव्योऽयम्** (असंउ. ४; सुक. ८.५-८)

वातप्रकृतीचा एक किडा.

**शृङ्गनिर्मितवाद्यविशेषः** (र., ६.१४)

शिंगाचे बनविलेले एक वाद्य.

**वनस्पति० कर्कटशृङ्गी** (ध. १.८५; चसू. ४.१६; अहसू. १५.१२)

काकडशिंगी.

**अतिविषा** (ध.१.१०) अतिविष.

**–कन्द**–पु., वनस्पति० शृङ्गाटकः ( रापरि. ७.१८ )
शिंगाडा.
**–बेर**– न., वनस्पति० आर्द्रकम् ( ध., २.८४;
असंसू. ७.१५६ )
आले.
**शुण्ठी** ( ध. २.८२ ) सुंठ.
**–बेरक**–न., वनस्पति० आर्द्रकम् (असंसू.७.१५६)
आले.
**–भेदिन्**–पु., वनस्पति० गुण्ठः ( ध., १.८३ )
रोहिसगवताचा प्रकार.
**–मूल**–पु., वनस्पति० शृङ्गाटकः ( रापरि. ७.१८ )
शिंगाडा.
**–यंत्र**–न., नाडीयन्त्र० शृङ्गम् ( सुसू. ७.१३ )
शिंग. यंत्र.
**–रुह**–पु., वनस्पति० शृङ्गाटकः ( रापरि. ७.१८ )
शिंगाडा.
**–रोह**–पु., वनस्पति० भूतृणः ( रा. ८.७३;
रापरि. ८.४२ )
रोहिसगवत.
**–वेर**–न., वनस्पति० आर्द्रकम् ( चसू. ४.९;
सुचि. १४.१०; चसू. २५.३८ ) आले.
**–वेरिका**–स्त्री., शाक० गोजिह्विका, हरितवर्गे
( चसू. २७.१७१ )
गोजिव्हा.
**–वेरपचन**–न., शुण्ठीपाकभाण्डम्, शृङ्गवेरं पच्यतेऽस्मिन्निति अधिकरणार्थे ल्युट्प्रत्ययतोऽत्र द्रष्टव्यः सिद्धां तत्र काकमाचीं नाद्यात्संस्कारविरुद्धत्वात्
( असंसू. ९.१०; सुसू. २०.१४ )
सुंठ शिजवण्याचे भांडे. त्यात शिजविलेली कावळीची भाजी खाऊ नये. सुंठीचा कावळीवर होणारा संस्कार विरुद्ध दोष वर्धक होतो.
**–वेराम्बु**–न., शुण्ठ्या सहक्वथितं जलम्
( अहसू. ३.२३ )
सुंठ घालून कढवलेले पाणी.
**–वेरार्द्रकरस**–पु., वनस्पति० आर्द्रकरसः
( चचि. १३. १५३ ) द्र० 'आर्द्रक'
आल्याचा रस. पहा 'आर्द्रक.'
**शृङ्गक**–पु., वनस्पति० जीवकः ( ध. १.१२३ )
अष्टवर्गांपैकी एक. जीवनोपयोगी.
**शृङ्गाह्व**–पु., वनस्पति० जीवकः ( रा., ५.१५४ )
अष्टवर्गांपैकी एक. जीवनोपयोगी.

**( शृङ्गी )–विष**–न., 'महोरा' इति हस्तिनापुरनिकटे प्रसिद्धं विषम्, 'सिंगिया' इति वा (र. १२.७६)
दुसरी नावे वर आहेत. एक विष.
**शृङ्गाट**–न., वनस्पति० शृङ्गाटकः ( र. १३.१३-१९ )
शिंगाडा.
**मर्म० शृङ्गाटकमर्म** ( चचि. २६.१३९ )
एक मर्मस्थान.
**( शृङ्गाटी )**–स्त्री., वनस्पति० जीवन्ती ( रा. ३.१७८;
असंचि. ७ )
हरीणदोडी. जीवनोपयोगी.
**त्रिकण्टकफलम्, शृङ्गाटकः** ( सुउ. ४२.७० )
शिंगाडा.
**शृङ्गाटक**–पु., न., वनस्पति० त्रिकोणाकृतिः जलजकन्दशाकः; गुणाः–गुरु विष्टम्भि शीतं च ( चसू., २७.११७; सुसू., ४६.३०४ ) जलमध्ये **त्रिकण्टकफलम्** ( सुचि. ३.६१ ) **रक्तपित्ते उपयुक्तः** (चचि.४.७१) **फलासवार्थमुपयुक्तः** (चसू.२५.४९) **गर्भस्थापनार्थमुपयुक्तः** ( चशा.८.२४ ) **वृष्यघृते उपयुक्तः** ( चचि. २(२).२२ ) **पित्तजविसर्पे सघृतलेपनार्थमुपयुज्यते** ( सुचि. १७.६ ) **मेहे उपयुक्तं द्रव्यम्** ( सुचि. ११.१० ) **शीतो, गुरुः, लघुः, सरः** ( रापरि. ७.१८ ) **विष्टम्भी वृष्यतमः रुच्यः, तापश्रमांत्रिदोषघ्नः, मेहनदार्ढ्यकृत्**
( रापरि. ७.१८ )
हिं.—सिंघाडा.
**म.—शिंगाडे.**
गु.—शिंगोडा.
बं.—पाणिफल, शिंगाडा.
ता.—पौरी मत्ताईसाल, शिंगारकोट्टाइ.
फा.—सुरंजान्.
शिंगाडा. पाण्यातील त्रिकोणी कंद. भाजीही करतात. गुण–थंड, जड, अवष्टंभक. तीन काट्यांचे पाण्यातील फळ–थंड, जड, रुचकर, अवष्टंभक, उत्कृष्ट शुक्रवर्धक, शिश्नाला दृढसपणा आणते, आग, थकवा, त्रिदोषनाशक. ( हलके व सारक. ) रक्तपित्त, गर्भस्थापन, यासाठी उपयुक्त. शुक्रवर्धक म्हणून घृतात वापरण्यास उपयुक्त पित्तज विसर्पावर तुपातून लेप व मेहामध्येही उपयुक्त असून पचण्यास हलका, सारक, रुचकर, ताप, श्रम व त्रिदोषनाशक.
**मर्म० शृङ्गाटकमर्म** ( चचि. २६.१११ )
शरिरातील एक मर्मस्थान.

न., त्रिपथम् ( असंउ. ५ ) तिवाठा.

**-कशेरुकासव**-पु., आसुत० **कूलचराणां प्राणिनां मांसभक्षणोत्तरमनुपानत्वेन प्रोक्तः** ( सुसू. ४६.४३३ )
शिंगाडा व नागरमोथा यांचे आसव. हे जलाशयाच्या काठाशी चरणाऱ्या प्राण्यांचे मांस खाल्ल्यानंतर अनुपान म्हणून योग्य.

**-मर्मन्**-न., **प्राणश्रोत्राक्षिजिह्वासन्तर्पणीनां सिराणां मध्ये सिरासंनिपातः शृङ्गाटकानि, तानि चत्वारि मर्माणि, इमानि सिरामर्माणि चतुरङ्गुलप्रमाणानि सद्यःप्राणहराणि च** ( सुशा. ६.६ )
एक मर्मस्थान. नाक, कान, डोळे, जीभ, यांचे पोषण करणाऱ्या शिरांचा एकत्र आलेल्या शिरांच्या समुदायाचे स्थान. ही स्थाने चार आहेत. ही शिरा-मर्मे चार अंगुळ प्रमाणाची आहेत. ही सद्यःप्राणहर आहेत.

**शृङ्गार**-न., खनिज० **सुवर्णम्** ( रा. १३.३ ) सोने.
**अगरुभेदः, कृष्णागरु** (रा. १२.४०) द्र० **'अगरु'**
काळा अगरू.

**-भूषण**-न., खनिज० **सिन्दूरम्** ( ध. ३.१०१ )
शेंदूर.

**शृङ्गारक**-न., खनिज० **सिन्दूरम्** ( रा. १२. १६१ )
शेंदूर.

**शृङ्गिक**-न., विष० **वर्णेन कृष्णपिङ्गलम्** ( र. २९.१७ )
एक विष. वर्ण पिंगट, काळा.

**(शृङ्गिका)**-स्त्री., वनस्पति० **कर्कटशृङ्गी** ( रा. ६.११० )
काकडशिंगी.

**शृङ्गिन्**-पु., कीट० **अयं शूकतुण्डविषः** ( सुक. ३.५ )
एक किडा. याच्या नांगीत व सोंडेत विष असते.
**कन्दविष० गुणाः-स्निग्धो घनो गुरुः कर्मण्यश्च** ( असंउ. ४०.४८ )
एक कंदविष. गुण— स्निग्ध, भरीव, जड व कर्मकर.
**वनस्पति० ऋषभकः** ( रा. ५.१५७ )
अष्टवर्गापैकी एक. जीवनोपयोगी.
**प्लक्षः** ( ध. ५.८१ ) पिंपरी, नांदरूख.
**वटः** ( ध. ५.७६ ) वड.
**आम्रातकः** ( ध. ५.१२ ) आंबाडा.

**(शृङ्गि)-विष**-न., **कन्दविष० अनेनाङ्गसाददाहोदर-विवृद्धयो जायन्ते** ( सुक. २.५ )
एक कंदविष. याने अंग गळणे, आग, उदरवाढ होते.

**शृङ्गीक**-न., वनस्पति० **कर्कटशृङ्गी** ( असंचि. ४ )
काकडशिंगी.
**विष० कपिलदेशेषु नदीवृक्षेषु जायमानं गोशृङ्गवद्विधा शृङ्गयुक्तमन्तर्बहिःश्वेतं हस्तिनापुरनिकटे 'महोरा' इति नाम्ना प्रसिद्धं विषम्** ( र. १०.८५ )
कपिलदेशात नदीकाठच्या वृक्षावर होणारे गाईच्या शिंगासारखे दोन शिंगांनी युक्त आत व बाहेर पांढरे असलेले विष. दिल्लीजवळ 'महोरा' म्हणतात.

**( शृङ्गीका )**-स्त्री., वनस्पति० **आमलकी** ( असंउ. ४८ )
आवळा, आवळकाठी.

**शृङ्ग्यादिचूर्ण**-न., योग० **द्रव्याणि-कर्कटशृङ्गीवचाकट्फलरोहिषतृणमुस्तादेवदारुशुण्ठी धान्यहरीतकीभार्ङ्गीत्यादीनि । एतद्धिङ्गुयुतमुष्णजलेन पीतं घोरमपि कासं निहन्ति** ( सुउ. ५२.१४ )
काकडशिंगी इत्यादी चूर्ण. काकडशिंगी, वेखंड, कायफळ, रोहिसगवत, नागरमोथा, देवदार, सुंठ, धणे, हिरडा, भारंगमूळ, इत्यादी. हे हिंग घालून पाण्याशी प्याले की अति त्रासदायक खोकला नाहीसा होतो.

**शृत**-वि., **क्वथितम्, उत्क्वथितम्** ( चसू. ४.७; सुचि. ९.१८ )
कढवलेले, शिजवलेले, उकळलेले.

**-क्षीरदधि**-न., **क्वथितक्षीरोद्भवं दधि, गुणाः-वातपित्तहरं धात्वग्निबलवर्धनं रुच्यं च** ( सुसू. ४५.७७ )
उकळलेल्या दुधाचे दही. गुण— धातूंच्या अग्नीचे बलवर्धक, रुचकर व वातपित्तहर.

**-शीत**-वि., **आदौ शृतं पश्चाच्छीतम्** ( सुचि. २४.१०५ )
प्रथम कढवून नंतर थंड केलेले.

**-शीतजल**-न., **आदौ क्वथितं पश्चाच्छीतलं जलम्, इदं मद्यपानसमुद्भूते रोगे पित्तोत्थिते रोगे संनिपातजे च रोगे प्रशस्तम्** ( सुसू. ४५.४२-४३ )
प्रथम उकळून नंतर थंड केलेले पाणी. हे मद्यपानापासून उत्पन्न होणाऱ्या संनिपातज रोगात प्रशस्त.

**शेखर**-न., वनस्पति० **लवङ्गम्** ( रा. १२.८४ ) लवंग.

**( शेखरी )**-स्त्री., वनस्पति० **वृक्षादनी** ( ध. ४.९७ )
बांडगूळ.

**शेफस्**-न., शारीर० **मेहनम्, षट्पञ्चाशत्प्रत्यङ्गेष्वेकम् शुक्रवहस्रोतोमूलम्** ( चशा. ७.११; चवि. ५.८; सुनि. ३.५ )

लिंग, शिश्न. छप्पन्न प्रत्यंगांतील एक. शुक्रवाही स्रोतसाचे मूळ.

**-स्तम्भ**-पु., रोग० **मेढ्रस्तम्भः, अशीतिवातविकारेष्वेकः** ( चसू. २०.११ )
शिश्न ताठरणे. ऐशीवातविकारांपैकी.

**शेफालिका**-स्त्री., वनस्पति० **निर्गुण्डीः** ( ध. ४.८३; रा. ४.१२१ )
एक निर्गुंडी. निळ्या फुलांची रान निर्गुंडी.

**-पत्र**-न., **रक्तवृन्ता शारदकुसुमा शेफालिका, अस्याः पत्रमनुशस्त्रत्वेनोपयुज्यते** ( सुसू. ८.१५ )
लाल देठाच्या व शरदृतूत फुले येणाऱ्या निर्गुंडीचे पान. अनुशस्त्र म्हणून योजतात.

**शेलु**-पु., वनस्पति० **श्लेष्मातकः** ( चचि. २३.१८७; ध. ५.९४; सुक. २.४५-४६ )
भोकर.

**शेवल**-पु., न., वनस्पति० **शैवालम्** ( असंचि. ८ )
शेवाळ.
**पद्मकम्** ( असंचि. ८ ) पद्मकाष्ठ.

**शेष**-वि., **अवशिष्टम्** ( सुउ. २३.१२ )
अवशेष, शिल्लक, बाकी.

**-दोष**-पु., **अवशिष्टो दोषः** ( अहृसू. १३.१५ )
शिल्लक राहिलेला दोष.

**शैक्य**-वि., **तीक्ष्णम्** ( डल्हणः सुसू. ८.१९ )
तीक्ष्ण, टोकदार.

**शैक्यायस**-न., कृत्रिमधातु० **सारमयलोहम्, 'पोलाद' इति म. भाषायाम्** ( सुसू. ८.१९ )
पोलाद, तीक्ष्ण लोह.

**शैखरिक**-पु., वनस्पति० **अपामार्गः** ( ध. १.२६१; चवि.७.१९ )
आघाडा.
**विडङ्गम्** ( चवि. ७.१९ ) वावडिंग.

**शैग्रव**-वि. **शिग्रोः इदमिति शैग्रवम्** ( अहृसू. १५.४ )
शिग्रूचे-शेवग्याचे-पान, फूल इत्यादी.

**शैत्य**-न., **शीतत्वम्** ( चनि. १.२७ ) लक्षण० ( चनि. १.२७ ) रिष्टलक्षण० **हस्तपादोच्छ्वासादिषु स्वभावोष्णतायुक्तेषु यत्र शैत्यं तद्रिष्टलक्षणं मरणाय कल्पते** ( सुसू. ३२.३ )
थंडावा, थंडपणा. मरणसूचक चिन्ह. हात पाय उच्छ्वास इत्यादींच्या ठिकाणी-स्वाभाविक उष्णता असणारांच्या ठिकाणी-जर थंडावा असेल तर ते मरणाचे दर्शक असते.

**अग्नेरतिमन्दता** ( असंसू. २०.१६ )
अति अग्निमांद्य, अग्निमांद्य फार असणे.

**शैथिल्य**-न., **अनिबिडसंयोगता** ( चशा. ४.१४ )
शिथिलता, ढिलेपणा, घट्टपणाचा अभाव, घट्ट संयोगाचा अभाव.

**शैरीय**-न. वनस्पति० **सैरेयम्, झिण्टिका** (चसू.१४.३२)
निळी कोऱ्हांटी.

**शैरीष**-वि., **शिरीषस्य इदं, इति शैरीषम् (शिरीषपुष्पादि)** ( सुउ. ६१.३२; असंसू. १२-८९ )
शिरसाचे फूल, पान इत्यादी.
**शिरीषबीजम्, अपस्मारशमने सिद्धार्थकघृते एकं द्रव्यम्** ( सुउ. ६१.३२ ) **व्रणेषूत्सन्नमांसेषु मांसस्फोटनार्थमुपयुक्तम्** ( सुसू. ३७.,३२-३३ )
शिरसाचे बी. अपस्मारनाशक सिद्धार्थक तुपातील एक पदार्थ. ज्या व्रणात मांस वर आलेले असते ते झरण्याकरिता उपयुक्त.

**शैरीषत्वच**-स्त्री., **शिरीषवृक्षस्य त्वक् सेयं कुष्ठलेपे उपयुज्यते** ( चचि. ७.९६. )
शिरीषवृक्षाची साल. कुष्ठाला लेप करण्यास योजतात.

**शैर्यक**-पु., न., वनस्पति० **कुरण्टकः** (र.११.५३-५७)
कोऱ्हांटी.

**शैल**-पु., **पर्वतः** ( सुचि. ३०.४० ) पर्वत.
न., भैषज्य० **शिलाजतु** (रा. १३.२३९, पृ. १२८)
शिलाजतु.
**सोरकम्** ( र. २.१५१ )
सोरा. याचा चपला धातूच्या सत्वपातनात उपयोग होतो.

**-गर्भाह्वा**-स्त्री., वनस्पति० **शिलावल्का** (रा.५.२१३)
लकडी पाषाण भेदाचा प्रकार.

**-ज**-न., वनस्पति० **शैलेयम्** (रा. १२.१३१;पृ. ११०)
दगडफूल.

**-जजतु**-न., भैषज्य० **शिलाजतु** ( सुउ. ४४.३१ )
शिलाजीत.

**-जतु**-न., भैषज्य० **शिलाजतु** ( चचि. २८.२४२ )
शिलाजीत.

**-जामूल**-न., वनस्पति० **सैंहलीपिप्पली** (रा.६.११९)
सिंहली पिंपळी.

**-भेद**-पु., वनस्पति० **पाषाणभेदः** ( सुउ. १०.४ )
पाषाण भेद.

**-वर**-पु., **पर्वतश्रेष्ठः (हिमालयः)** ( चसि. ३.३ )
पर्वतात श्रेष्ठ, हिमालय.

**–वल्कला**–स्त्री., वनस्पति० शिलावल्का (रा. ५.२१३)
लकडी पाषाणभेदप्रकार.

**–सुता**–स्त्री., वनस्पति० तेजोवती (रा. ३.३९२)
मालकांगोणीप्रकार.

**शैलक**–न., खनिज० शैलेयम् (रा. १२.१३१) शिलाजतु.

**शैलान्तर**–न., शैलयोर्मध्यभागः, शैलस्था गुहा (चवि. ६.१७)
दोन पर्वतांमधील झाडीयुक्त भाग. दोन डोंगरांतील मधला भाग. डोंगरातील गुहा.

**शैलेन्द्रस्थ**–पु., वनस्पति० भूर्जः (रापरि. ९.२३)
भूर्जपत्र.

**शैलु**–पु., वनस्पति० श्लेष्मातकः (ध. ५.९४) भोकर.

**शैलूष**–पु., वनस्पति० बिल्वः (ध. १.१०६) बेल.

**शैलेय**–न., भैषज्य० शिलाजतु (ध. ३.१६५; चचि. २८.१५२; र. २२.१६७) शिलाजतु.
वनस्पति० **भद्रमुस्तम्** (चसू. ३.२८; चक.१.२३)
नागरमोथा प्रकार. भद्रमोथा.
भैषज्य० **शिलापुष्पम्, ' दगडफूल ' इति लोके** (र. २२.१४८) दगडफूल.
वनस्पति० **सुगन्धिद्रव्य० धूमपानप्रयोगे एकं द्रव्यम्** (चसू. ५.२२; चचि. ३.२६७; असंसू. ७.१५६) **गुणाः–तिक्तं** (ध) **शीतलं लघु, हृद्यं कफपित्तहरं कण्डूकुष्ठाश्मरीदाह-विषहृद्गुदरक्तहरं च** (सुक. ६.१४-२७) **तिक्तं सुगन्धि रक्तदोषतृष्णावमिश्वासव्रणदोषहरं च** (ध. ३.७३)
हिं.—पत्थरफूल, भूरिछरिला.
**म.—दगडफूल.**
गु.—पत्थरफूल.
बं.—शैलज.
फा.—दहाल.
दगडफूल. सुगंधी द्रव्य. धूम्रपानात, व मसाल्यात हे द्रव्य वापरतात. गुण–कडु, हलके, थंड, हृदयाला हितकर, कफपित्तनाशक, कंडू, दाह, कुष्ठ, विष, गुदातून स्रवणारे रक्त, मूतखडा, व्रण, रक्तदोष, तहान, ओकारी, श्वास नाशक.

**शैलेयक**–पु., वनस्पति० शैलेयम् (चक. १.२३; असंशा. ४.५१)
शिलाजीत.

**शैलोद्भव**–न., लवण० शैलोद्भवलवणम् (सुसू. ४६.३२१) डोंगरातील मीठ.

(**शैलोद्भवा**)–स्त्री., वनस्पति० शिलावल्का (रा. ५.२१६)
लकडी पाषाणभेदाचा प्रकार.

**शैव**–पु., वनस्पति० वसुकः (रा. १०.३३; रापरि.५.३७)
पांढरी किंवा लाल मंजरी असलेली वनस्पती.
**धत्तूरः** (१०.१२)
धोतरा.

(**शैवी**)–वि., **शिवदेवतायाः नाम शिवार्था यज्ञे दत्ता (आहुतिः)** (चचि. ३.१८)
शिवदेवतेचे नाव. यज्ञात शंकराला दिलेली (आहुति).

**–पत्र**–पु., वनस्पति० बिल्वः (रा. ११. १३४) बेल.

**शैवल**–न., वनस्पति० दूर्वा (सुउ. १०.४) दूर्वा.
**पद्मकम्** (चचि. ४.१०३) पद्मकाष्ठ.
**शैवालम्** (सुसू. १३.१४; सुचि. ५.८) शेवाळ.

**–श्यावा**–स्त्री., **शैवलमिव श्यावा नाम कृष्णा; शुद्धजलोद्भवा जलूका निर्विषा शैवलश्यावा वर्तते** (अहसू. २६.३८)
शेवाळासारखी हिरवट, काळसर शुद्ध पाण्यातील जळू निर्विष व शेवाळा सारखी सावळी असते.

**शैवाल**–न., वनस्पति० **निर्वापणप्रदेहे उपयुज्यते** (चसू. ३.२६; असंसू. ६.२७) **गुणाः–तिक्तकटुकं कषायं शीतं कान्तिदं मध्यं वातान्ध्यविसर्पकण्डू-कुष्ठविषापहं च** (ध. १.४३) **स्निग्धं तापहरं व्रणनाशनं च** (रा. ८.६४)
हिं.—सिवार.
**म.—शेवाळे.**
गु.—शेवाल, लील.
बं.—शेयोआला.
फा.—पशमेंदरा, जामेंगुक, जबाल.
शेवाळ. **गुण**—कडु, तिखट, तुरट, थंड, कांति वाढवणारे, धारणाशक्तिवर्धक, वातामुळे येणारा आंधळेपणा, धावरे, कंडु, कुष्ठ, विष नाशक. लेपा-करिता उपयुक्त.

**–मूल**–न., **शैवालस्य मूलम् जलप्रसादनकरमिदं द्रव्यम्** (सुसू. ४५.१७)
शेवाळाचे मूळ. हे पाण्याची शुद्धि करते.

**शैशुकसर्पिस्**–न., (परिव०) **ससिद्धघृत० वातगुल्मनिवारणार्थमुपयुज्यते** ( काचि. २७ )
तयार केलेले औषधी तूप. वातज गुल्म नाहीसे करण्याकरिता योजतात.

**शैशुकस्नेह**–पु., (परिव०) **बालानां बस्तिकर्मोपयोगी सिद्धस्नेह०** ( कासि. ८ )
मुलांना बस्ति देण्यास उपयोगी म्हणून तयार केलेला स्नेह.

**शोक**–पु., **मनोभाव० दुःखम्** (चनि. ७.४;सुचि.३९.१४)
**शोकं दैन्येन ( रोदनादिना ) परीक्षेत** ( चवि. ४.८)
**असौ शोषणानां श्रेष्ठः** ( चसू.२५.४०; असंसू. १३.३ )
दुःख. दीनवाणा चेहरा असला तर किंवा रडणे इत्यादीवरून शोक ओळखावा. हा शरिराचे शोषण म्हणजे कृश करण्यांत–क्षयाच्या कारणात श्रेष्ठ आहे.

**–कर्शित**–वि., **शोकेन कर्शितः नाम क्षीणः शोककर्शितं बृंहयेत्** ( अहृसू. १४.८ )
दुःखाने कृश झालेला–क्षीण झालेला. याला पौष्टिक औषधे द्यावीत.

**–नाश**–पु., **वनस्पति० अशोकः** ( ध. ५.१५९ )
अशोक.

**–शल्य**–न., **शोक एव शल्यम्; हृद्यवस्थितमनेककारणोत्पन्नं शोकशल्यं हर्षेण जयेत्** (सुसू. २७.५)
**शोकजनितमानसोन्मादे सान्त्वनादिभिः शोकशल्यमपनयेत्** ( सुउ. ६२.३५ )
शोकरूपी शल्य. हृदयात असलेले अनेक कारणांनी उत्पन्न झालेले शोकरूपी शल्य आनंदोत्पादक उपायांनी घालवावे. शोकज मानसिक उन्मादात सांत्वन इत्यादी व आनंदोत्पादक उपायांनी हे घालवावे.

**–शोष**–पु., ( परिव० ) **रोग० शोकजः शोषः** ( सुउ. ४१.१८ )
शोकापासून उत्पन्न झालेला क्षय.

**शोकातीसार**–पु., **रोग० शोकेनोत्पन्नोऽतीसारः द्र० ' अतिसार '** ( चचि. १९.११ )
शोकापासून उत्पन्न झालेला अतिसार. पहा ' अतिसार '

**शोण**–पु., **वनस्पति० टिण्टुकः** (रा. ९.१४३) टेंटु.
वि., **रक्तवर्णम्** ( र. ५.५० )
तांबड्या वर्णाचा.
**इक्षुभेदः, रक्तेक्षुः** ( रा. १४.१८९ ) **द्र० 'इक्षु'**
तांबडा ऊस. पहा ' इक्षु '.
**सिन्दूरम्** ( रा. १२.१६० ) शेंदूर.

**( शोणी )**–स्त्री., **वनस्पति० सैरेयकः** ( रा. १०.४१९; पृ. ६३ )
लाल कोरांटी.

**–झिण्टिका**–स्त्री., **वनस्पति० सैरेयकः** ( रा. १०.४१९; पृ. ६३ )
लाल कोरांटी.

**–पत्र**–पु., **वनस्पति० पुनर्नवा** ( रा. ५.४०८ )
लाल पानांचा पुनर्नवा.

**–पद्म**–न., **वनस्पति० रक्तपद्मम्** ( रा. १०.२४१)
तांबडे कमळ.

**–पाण्डुरा**–वि., **रक्तश्वेतवर्णा, इयं मृत्तिका मूषार्थं शस्यते** ( र. १०.६ )
तांबडट पांढऱ्या रंगाची माती. ही मुसेकरिता उपयुक्त.

**–पुष्पी**–स्त्री., **वनस्पति० सिन्दूरी** ( रापरि. १०.१९)
लाल बाणगवत.

**–शालि**–स्त्री., **वनस्पति० रक्तशालिः** ( रा. ६.८७ )
**द्र० ' शालि '**
तांबडी साळ. पहा ' शाली '

**–संभव**–न., **वनस्पति० पिप्पलीमूलम्** (रा.६.११३)
पिंपळमूळ.

**शोणित**–न., **शारीरधातु० रक्तम्; दशप्राणायतनेष्वेकम्** ( चशा. ७.९; सुसू. २१.१७; सुसू. १४.२१ )
**शरीरे शोणितप्रमाणं अष्टावञ्जलयः** (चशा. ७.१५)
रक्त. शरिरातील एक धातु. प्राणांच्या दहा स्थानांपैकी एक. शरिरात रक्ताचे प्रमाण दहा ओंजळी.
**आर्तवम्, रजः** ( सुशा. २.१ )
रज. स्त्रियांचा मासिक स्राव.
**स्त्रीबीजम्** ( चशा. ३.३; सुशा. ५.३; काजातिसूत्रीय. ४)
स्त्रीचे बीज.
**वनस्पति० चन्दनभेदः, रक्तचन्दनम्** (रा. १२.१०)
**द्र० ' चन्दन'**
रक्तचंदन. चंदनाचा प्रकार. पहा ' चंदन '
**कुङ्कुमभेदः,तृणकुङ्कुमम्** (रा. १२.२३) **द्र० 'कुङ्कुम'**
केशराचा प्रकार, गवती केशर. पहा ' कुंकुम '.
**कुङ्कुमम्** ( रा. १२.२१ ) केशर.

**–किट्ट**–न., **रक्तधातोर्मलः पित्तम् ' शोणितकिट्टप्रभव उण्डुकः '** ( सुशा. ४.२५ )
रक्तधातूचा मळ, पित्त, रक्त व मळ यांपासून उण्डुक झाला आहे.

**–क्लेद**–पु., रोग० **शोणितस्य प्रमाणतोऽप्यधिक-मार्द्रत्वम्, चत्वारिंशत् पित्तविकारेष्वेकः** ( चसू. २०.१४ )

रक्ताचा द्रव. रक्ताचा प्रमाणापेक्षा अधिक ओलावा.

**–क्षय**–पु., लक्षण० **रक्तनाशः** ( सुशा. ६.२४ ) रक्तनाश.

**रक्तधातुप्रमाणहीनत्वम्; शोणितक्षये त्वक्पारुष्य-मम्लशीतप्रार्थना सिराशैथिल्यं चेति लक्षणानि भवन्ति** ( सुसू. १५.९ )

रक्तधातूचे प्रमाणापेक्षा कमी प्रमाण असणे. रक्त-क्षयात त्वचा खरखरित शिरा शिथिल असतात व आंबट आणि थंड पदार्थांची इच्छा होते.

**–गन्ध**–पु., **रक्तस्य गन्धः** ( सुसू. १३.२१ )

रक्ताचा वास.

**–गर्ध**–वि., **शोणितलौल्यः** ( सुसू. १३.२१ )

रक्ताला लालचावणे, रक्ताची लालूच असलेला.

**–गुल्म**–पु., रोग० **रक्तगुल्मः, पञ्चगुल्मप्रकारेष्वेकः** ( चनि. ३.३ ) द्र० ' गुल्म ' ' रक्तगुल्म '

रक्तगुल्म. पांच गुल्मांपैकी एक. पहा ' रक्तगुल्म '.

**–च्छर्दि**–स्त्री., लक्षण० **रक्तस्य च्छर्दिः; क्षतक्षीणस्य पूर्वरूपमेकम्** ( चचि. ११.१३ )

रक्ताची ओकारी. उरःक्षताने क्षीण होण्याच्या पूर्वा-वस्थेतील एक चिन्ह.

**–ज**–वि., **शोणितात् शोणिते वा जातम् शोणितसंश्रयं वा** ( चवि. ७.९ )

रक्तापासून किंवा रक्तांत किंवा रक्ताच्या आश्रयाने झालेले.

**–ज–कृमि**–पु., रोग० **कुष्ठैः समानं समुत्थानं, स्थानं**र**—क्तवाहिन्यो धमन्यः, संस्थानम्—अणवो वृत्ताश्चापादाश्च, सूक्ष्मत्वाच्चैके भवन्त्यदृश्याः, वर्णः—ताम्राः, नामानि–केशादा, लोमादा, लोमद्वीपाः, सौरसा, औडुम्बरा, जन्तुमातरश्चेति; प्रभावः—केशश्मश्रुनखलोमपक्ष्मापध्वंसः, व्रणागतानां च हर्षकण्डूतोदसंसर्पणानि, अतिवृद्धानां च त्वक्सिरास्नायुमांसतरुणास्थिभक्षणमिति, चिकित्सा—कुष्ठसमा ज्ञेया** ( चवि. ७.११ )

रक्तजकृमि. कुष्ठाच्या कारणासारखी कारणे. स्थान—रक्तवाहिन्या. आकार—अणुसारखे सूक्ष्म गोलप्राय नसणारे. तांबड्या रंगाचे. सूक्ष्मत्वामुळे अदृश्य असतात. नावे वर आहेत. त्यांचा प्रभाव—डोके, पापण्या, तोंड व अंगावरचे केस, नखे, यांचा नाश. व्रणात कृमि, खाज, टोचणी, वळवळ होते. व व्रणाच्या भोवतालचे केस एकदम उभे रहातात. हे अतिशय वाढले तर त्वचा, शिरा, स्नायु, मांस व कोवळी हाडे खातात. उपचार कुष्ठासारखे.

**–जरोग**–पु. रोग० **रक्तजरोगः** (चसू. २४.११-१७)

रक्तातले रोग. रक्त दुष्ट झाल्यामुळे होणारे रोग.

**रक्तजा रोगाः—मुखपाकोऽक्षिरागश्च पूतिघ्राणास्य गन्धिता । गुल्मोपकुशवीसर्परक्तपित्तप्रमीलकाः । विद्रधी रक्तमेहश्च प्रदरो वातशोणितम् । वैवर्ण्यमग्नि-नाशश्च पिपासा गुरुगात्रता । संतापश्चातिदौर्बल्य-मरुचिः शिरसश्च रुक् । विदाहश्चान्नपानस्य तिक्ता-म्लोद्गिरणं क्लमः । क्रोधप्रचुरता बुद्धेः संमोहो लवणास्यता । स्वेदः शरीरदौर्गंध्यं मदः कंपः स्वरःक्षयः । तंद्रा निद्रातियोगश्च तमसश्चाति-दर्शनम् । कंडु रुक् कोठपिडिका कुष्ठचर्मदलादयश्च, शीतोष्णस्निग्धरूक्षाद्यैः उपक्रान्ताश्च ये गदाः सम्यक्साध्या नसिध्यन्ति रक्तजांस्तान्विभावयेत् ।** ( चसू. २४.११-१७ )

रक्तज विकार. यादी वर आहे. शिवाय जे सहज साध्य विकार दिसत असून थंड, उष्ण, स्निग्ध, रूक्ष, इत्यादी उपचार करूनही जे बरे होत नाहीत ते रक्तज विकार समजावे.

**–दर्शन**–न., लक्षण० **मुखादिमार्गेण शोणितनिर्गमः** ( सुउ. ४१.११ )

तोंड नाक इत्यादी मार्गाने रक्त जाणे. रक्त दिसणे.

**–पित्त**–न., रोग० **रक्तपित्तम्** ( चसू. १.१०८ )

रक्तपित्त रोग.

**–पूर्णकोष्ठता**—स्त्री., **रक्तेन पूर्णः कोष्ठः यस्य यस्मिन्वा, तस्य भावः; पार्श्वसंधिमर्मविद्धलक्षणम्** ( असंशा. ७.१२ )

रक्ताने कोठा भरणे. फासळ्याचे संधीचे मर्मस्थान कापले गेल्याचे लक्षण.

**–प्रभ**–वि., **रक्तच्छायः, रक्तकान्तिः** (सुनि. १६.९ )

रक्तासारखी कांति. लाल वर्णाचा.

**–फेन**–पु., **रक्तस्य फेनः, ' फुप्फुसः शोणितफेनप्रभवः'** ( सुशा. ४.२५ )

रक्ताचा फेस. रक्ताच्या फेसापासून फुप्फुस झाले आहे.

**–भाव**–पु., लक्षण० **रक्तस्रावः** ( असंशा. ४.२७ )

रक्ताचा स्राव.

**–मेह**–पु., रोग० रक्तवर्णमूत्रत्वाद्रक्तमेहः, पित्तजमेहेष्वेकः (सुनि. ६.९; सुचि. ११.९; असंनि. १०.२५) द्र० 'मेह'
लाल लघ्वी होणारा प्रमेह रोग. पित्तज मेहांपैकी एक. पहा 'मेह'.

**–रोग**–पु., शोणितजा रोगाः (चसू. २४.१८)
रक्तज रोग.

**–वर्णनीय**–वि., अध्यायसंज्ञा० शोणितवर्णनमधिकृत्य कृतोऽध्यायः (सुसू. १४.१)
अध्यायाचे नाव. यात रक्ताबद्दलची माहिती आहे.

**–वहस्रोतस्**–न., स्रोतो० शोणितवहनशीलं स्रोतः (चवि. ५.८)
रक्त वहाणारे स्रोतस, रक्तवाहिनी.

**–वाहिनी**–स्त्री., सिरा० शोणितं वहति यस्याम् (चनि. ६.८)
रक्तवाहिनी. जिच्यातून रक्त वहाते ती.

**–ष्ठीवन**–न., रक्तस्य थूत्कारः (चनि. ६.१४; सुचि. ३४.१३)
रक्ताची थुंकी. रक्त थुंकणे. रक्ताचा बेडका.

**–संमोह**–पु., रक्ताप्रवृत्तिः (सुशा. ८.१९)
रक्ताची प्रवृत्ती नसणे.

**–स्थापन**–वि., दुष्टशोणितस्य दुष्टिमपहृत्य शोणितं प्रकृतौ स्थापयतीति रक्तप्रसादनं वा (चसू. ४.८)
रक्ताची दुष्टि नाहीशी करून रक्त स्वाभाविक निर्दोष करणारे किंवा रक्तस्तंभक.

**–स्थापनगण**–पु., द्रव्यगण० शोणितस्थापनानि द्रव्याणि–मधुमधुकरुधिरमृत्कपाललोध्रगैरिकमोचरसप्रियङ्गुशर्करालाजा इति दशेमानि द्रव्याणि (चसू. ४.४६; असंसू. १५.४५)
रक्त निर्दोष करणारी किंवा रक्तस्तंभक द्रव्याचा गण. द्रव्ये–मध, ज्येष्ठमध, केशर, मातीचे खापर, रोध्र, गेरू, मोचरस, गव्हला, साखर व लाह्या.

**–स्राव**–पु., रक्तस्रावः (सुनि. ८.३) रक्तस्राव.

**शोणिताक्त**–वि., रक्तयुक्तम् (सुचि. २९.१२)
रक्तयुक्त. रक्ताने माखलेले.

**शोणितागमन**–न., लक्षण० रक्तस्रुतिः (सुशा. ९.१२)
रक्तस्राव, रक्त येणे.

**शोणितातिप्रवृत्ति**–स्त्री., अतिरक्तस्रावस्य प्रवृत्तिः (सुशा. ६.२६)
रक्तस्रावाची फार प्रवृत्ति. रक्तस्राव फार होण्याची प्रवृत्ति.

**शोणितातियोग**–पु., लक्षण० शोणितस्यातिस्रावः अर्शोविकारे शोणितातियोगोपद्रवा आक्षेपादयो भवन्ति (सुनि. २.१३)
शोणिताचा–रक्ताचा अतियोग. अतिशय रक्तस्राव, मूळव्याधरोगात अतिशय रक्तस्राव झाल्याने आक्षेपक (आचके) इत्यादी विकार होतात.

**शोणितातिषेक**–पु., लक्षण० शोणितस्यातिस्रावः (चनि. १.१९)
रक्ताचा अतिशय रक्तस्राव.

**शोणितादिधातु**–पु., शारीरधातु० शोणितादयो धातवः ते च यथोत्तरं गुरवो ज्ञेयाः (चसू. २७.३३७)
रक्तादि धातु. रक्त मांस इत्यादी धातु उत्तरोत्तर गुरु समजावे.

**शोणिताभिष्यन्द**–पु., नेत्ररोग० द्र० 'अभिष्यन्द' (चसू. २६.८४)
रक्तदुष्टीने डोळे येणे.

**शोणितार्बुद**–न., रोग० रक्तार्बुदम्. शूकदोषजरोगेष्वेकम् (सुनि. १४.१३; असंउ. ३४) द्र० 'अर्बुद'
रक्तदुष्टीने होणारा अर्बुद. अवाळू. लिंग मोठे करण्याच्या चुकीच्या उपचारांच्या अनिष्ट परिणामांपैकी एक.

**शोणितार्मन्**–न., नेत्ररोग० शुक्लमण्डले समं श्लक्ष्णं पद्माभमधिमांसकं भवति (असंउ. १३.२२६; सुउ. १.३८)
डोळ्याच्या पांढऱ्या भागात गुळगुळीत कमळासारखे सारख्या पातळीचे मांस वाढते तो रोग.

**शोणितार्शस्**–न., नेत्ररोग० (सुउ. १.३६) नेत्रवर्त्मगतोऽङ्कुरान्वितः, यस्मिन्वर्त्मस्था मृदवोऽङ्कुरा असकृच्छिन्ना अपि विवर्धन्ते, दाहकण्डूरुजावन्तश्च भवन्ति (सुउ. ३.२६) असाध्योऽयम् (सुउ. १३६)
रक्ती मूळव्याध (डोळ्यातली). डोळ्याच्या पापणीतील उत्पन्न झालेले अंकुर. हे मऊ अंकुर वारंवार कापले असताही पुन्हा वाढतात. ते दाह– खाज वेदनायुक्त असतात. हा असाध्य असतो.

**शोणितावसेक**–पु., उपक्रम० रक्तमोक्षणम् (सुशा. ८.४) शोणितावसेकसाध्यरोगाः– त्वग्दोषा ग्रन्थयः शोफा शोणितजा रोगाश्च, तेषु सिरां विध्येत् (सुसू. १४.३४) द्र० 'रक्तमोक्ष'
रक्त काढणे. रक्तस्राव करणे. रक्तस्रावाने साध्य होणारे रोग—त्वग्विकार, गाठी, सर्व प्रकारची सूज, व रक्तजन्य रोग. यात शिर तोडून रक्तस्राव करावा.

**शोणितावृत**–वि., रक्तेनावृतम् ( सुउ. २१.३४; चचि. २८.१९४ )

रक्ताने आवृत. रक्ताने रुद्ध. रक्ताने अडवलेला.

**शोणितास्थापन**–न., शोणितातिप्रवृत्तिस्तम्भनम् ( सुचि. १.४८ ) एतद्धि चतुर्विधम्—संधानं स्कन्दनं पाचनं दहनं च। कषायो व्रणं संधत्ते, हिमं रक्तं स्कन्दयते, क्षौमादिजं भस्म संपाचयति, दाहः सिराः संकोचयति ( सुसू. १४.४० ) व्रणस्य षष्ट्युपक्रमेष्वेकः ( सुचि. १.८ )

रक्ताचा अतिस्राव थांबविणे. हे चार प्रकारचे. (१) व्रण भरून आणणे. हे कार्य कषायरस करतो. (२)रक्त गोठविणे. हे कार्य थंड द्रव्य करते. (३)पाचन. ताग, रेशीम यांचे भस्म हे कार्य करतात. (४) डाग. डाग दिल्याने शिराच संकुचित होतात. व्रणाच्या साठ उपचारांपैकी एक.

**शोथ**–पु., रोग० संप्राप्तिः–दुष्टो वायुर्दुष्टान् रक्तपित्तकफान् बहिः सिरा नीत्वा तैः रुद्धगतिः सन् त्वङ्मांससंश्रयमुत्सेधं कुर्यात्। अतो निचयात्संहतं तं शोथमाहुः। हेतुविशेषैः रूपभेदाच्च शोथं नवात्मकमाहुः। वातजपित्तजकफजसंनिपातजद्वन्द्वजभेदात्सप्त, विषजाभिघातजश्च द्विधा, इति नवप्रकाराः शोथाः। शोथहेतुः क्षुद्ध्यामयाभुक्तादिभिः कृशानां च क्षाराम्लतीक्ष्णोष्णगुरूपसेवनं निजस्य शोथस्य कारणम्। तथा च आमं दधि मृच्छाकविरोधिदुष्टान्नपानादिगरोपसृष्टान्नसेवनमर्शांसि निष्क्रियत्वं देहाशुद्धिर्मर्मोपघातः आमगर्भपतनादिका विषमा प्रसूतिः वमनादीनामसम्यगुपचारश्चेति निजस्य शोथस्य हेतवः। पूर्वरूपम्–उपतापः सिराप्रसरणवत्पीडाऽङ्गगौरवं च। सामान्यलक्षणानि –गौरवमनवस्थितत्वमुत्सेध ऊष्मा सिरातनुत्वं लोमहर्षो वैवर्ण्यं च। तत्र वातजशोफलक्षणानि– वातजशोथः स्थानात्स्थानान्तरगतिस्तनुत्वक् स्पर्शाज्ञत्वकारी परुषोऽरुणोऽसितो हर्षार्तियुतः। अनिमित्ततः प्रशाम्यति। प्रपीडितः प्रोन्नमति। दिवा च बलवान् भवति। स्नेहोष्णमर्दनाद्यैश्च प्रशाम्यति। पित्तजः शोथः मृदुस्पर्शो गन्धयुक्तः कृष्णपीतरक्तो भ्रमज्वरस्वेदतृष्णामदान्वितोऽतिशयदाहपाकवान्क्षिरागकृत्सपष्टरुक् च। कफजः शोथः–गुरुः स्थिरः पाण्डुररोचकान्वितः प्रसेकनिद्रावमिवह्निमान्द्यकारी चिरोत्पत्तिविनाशो निपीडितो नोन्नमति। रात्रौ च बलवान्भवति। द्विदोषजः शोथो निदानाकृतिसंसर्गाज्ज्ञेयः। संनिपातजः शोफो व्यामिश्रलक्षणः सर्वाकृतिश्च भवति। अभिघातजशोथः–शस्त्रादिच्छेदभेदक्षतादिभिरभिघातेन भवति। तथा च शीतवातैः समुद्रवातैर्भल्लातककपिकच्छुजै रसैः शूकैश्च संस्पर्शाद्भवति। स विसर्पवान्भृशोष्मा लोहिताभासः प्रायशः पित्तलक्षणश्च। विषजशोथः- सविषप्राणिपरिसर्पणमूत्रणादंष्ट्रादन्तनखाघातादविषप्राणिनामपि विण्मूत्रशुक्रोपहतमलवद्वस्त्रसंसर्गात् विषवृक्षानिलस्पर्शाद्गरयोगावचूर्णनाद्वा असौ भवति। स च मृदुश्चलोऽवलम्बी शीघ्रो दाहरुजाकरश्च भवति। आशयभेदेन शोथस्थानानि आमाशयस्थिता दोषा ऊर्ध्वं शोथं कुर्वन्ति। उरःपक्वाशयमध्ये तु पक्वाशयस्था दोषाः शोथं कुर्वन्ति। पक्वाशयादधः वर्चःस्थानगता दोषाः शोथं कुर्वन्ति। सर्वसरं शोथं कृत्स्नदेहमनुप्राप्ता दोषाः कुर्वन्ति। साध्यासाध्यत्वम्– मध्यदेशस्थितः सर्वगश्च कष्टः। अर्धाङ्गो रिष्टभूतः ऊर्ध्वपरिसर्पणः श्वासपिपासाच्छर्दिदौर्बल्यज्वरारोचकादियुक्तश्चासाध्यः। अकारणसमुत्थितः पादजः शोथः पुरुषं हन्ति। मुखजो गुह्यगश्च नारीं पुरुषं च हन्ति। कुक्ष्युदराश्रितः गले मर्मणि वा स्थितः स्थूलः खरो वाऽसाध्यः। तथैव बालवृद्धकृशानामसाध्यः। अनुपद्रवो नवश्च शोथः साध्यः (मा.) उपद्रवाः–श्वासः पिपासा दुर्बलत्वं ज्वरश्छर्दिररोचको हिक्काऽतीसारः कासश्च ( सुचि. २३.८ ) शोथः शोफशब्देनापि केषुचिद्ग्रन्थेषु निर्दिश्यते।
( सुसू. १७.१८-१९; सुचि. २३.; काखिल. १७; चसू. १८; चचि. १२; अहनि. १३; अहचि. १७ )

सूज. रोग. संप्राप्ति— वायु दुष्ट होऊन दुष्ट झालेल्या रक्त पित्त व कफ यांना बाहेरच्या शिरात नेतो. त्यांनी रुद्ध झालेला तो वायु त्यामुळे त्या शिरांतून त्या रक्तपित्त कफांना बाहेर पाडून त्वचा व मांस यांच्या आश्रयाने त्यांचा संचय करतो. त्यामुळे संचित भाग उंच फुगलेला होतो. दोषांच्या संचयाने उंच फुगणे याला सुजणे किंवा सूज म्हणतात. प्रकार ९. ते स्वरूपभेदाने सात व कारणभेदाने २. स्वरूपभेद– वातपित्तकफज तीन. दोषांचे तीन व सर्व दोषांचा एक असे सात. कारणभेद. विषज व आघातज. **कारणे**–शरिराची रेचक इ० घेऊन शुद्धि न करणे, हे उपचार केले तर ते चुकीचे करणे. रेचक इ०

नी व लंघनाने कृश व दुर्बळ झालेल्या व्यक्तीने क्षार, आंबट, तीक्ष्ण, उष्ण, जड यांचे अति सेवन करणे, अदमुरे दही, पालेभाज्या, विरोधी अन्ने, विटलेले अन्न, कृत्रिम विषयुक्त अन्न पान, माती, काही न करणे, मूळव्याध, गर्भस्राव, प्रसूति त्रासाने होणे, मर्मस्थानावर आघात. **पूर्वरूपे**— सूज यावयाचा भाग तापणे-गरम होणे, शिरा पसरतात- ताणल्या जातात अशा वेदना व तो भाग जड वाटणे. **सामान्य लक्षणे**- सुजेचा भाग जड वाटणे. तोहि मधून जड, मधून हलका वाटणे, त्या भागात उष्णता व शिरा बारीक वाटणे, रंग पालटतो व रोमांच उभे राहतात. **चिन्हे**— दोषांच्या सुजेत दोषवैशिष्टये असतात. **वाताची** अस्थिर, **कफाची** जड व स्थिर, **पित्ताची** आगयुक्त तसेच रंग इत्यादी त्या त्या दोषाची असतात. मिश्र दोषजात मिश्र व सन्निपातज सुजेत सर्वदोषाची लक्षणे असतात. आघारावाला आघात व विषज सुजेला विष कारण स्पष्टपणे कळते. दोषांच्या स्थानानुरूप सुजेची स्थाने—आमशयस्थ दोष वरच्या भागात, पक्वाशयातील दोष छाती व पक्वाशय यात व मळ स्थानातील दोष पक्वाशयाच्या खालच्या भागात सूज करतात. सर्वशरीरव्यापी दोष सर्वांगाची सूज करतात. **साध्यासाध्यत्व**-नवी व उपद्रव नसलेली सूज साध्य. मधल्या शरीरभागावरची व सर्व शरिरावरची कष्टाने साध्य. वर पसरणारी तहान श्वास ओकारी, दुबळेपणा, चव नसणे, ताप यानी युक्त असाध्य. कारणावाचून उत्पन्न झालेली पुरुषाची पायांची सूज व तोंडावरची आणि गुप्तस्थानची सूज पुरुष व स्त्रीचीही असाध्य. तसेच कूस, पोट, गळा, हृदय, यावरची जाड खरखरीत सूज सुद्धा असाध्य. बाल वृद्ध व कृश यांची सूज असाध्य. अर्ध्या अंगावर येणारी सूज मरणदर्शक. **उपद्रव**-तहान श्वास इत्यादी वर सांगितलेले व उचकी खोकला अतिसार हे उपद्रव होत. शोथाला काही ग्रंथकार शोफही म्हणतात.

**-हर**-वि., **शोथघ्नम्, पञ्चकषायवर्गे एको गणः** ( चसू. ४.१६ )

सूजहारक, सूजनाशक. औषधींचा एक वर्ग आहे.

**शोथिन्**-वि., **शोथयुक्तः** ( चसू. १३.९१ )

सूज असलेला रोगी.

**शोधक**-पु., **वनस्पति॰ कङ्कुष्ठम्** (रा. १३.२००) कंकुष्ठ.

**शोधन**-न., **वनस्पति॰ कङ्कुष्ठम्** (ध. ३.१४१) कंकुष्ठ.

**कासीसम्** ( १३.१७९ ) हिराकस.

**उपक्रम॰ दोषाणां शरीराद्बहिर्निर्हरणम्, चिकित्साप्रकारः** ( चसू. १.७६; सुचि. १.५४ ) **शोधनं शमनं चेति समासाद्द्विधौषधं भवति** (अहृसू. १.२५) **तत्रापि शोधनं पञ्चधा-निरूहो वमनं कायरेकः शिरोरेकोऽस्रविस्रुतिश्च** ( असंसू. २४.७ )

**व्रणोपक्रमेषु शोधनं नाम पूयादिदुष्टद्रव्यविस्रावणम्** ( सुसू. १७.१८ ) **व्रणशोधनं तावदष्टविधम्—कषायवर्तिकल्कघृततैलरसक्रियाचूर्णधूपनभेदेन** ( सुसू. ३७.१२ ] **शोधनार्हाः— स्थौल्यबलपित्तकफादिकाः, आमदोषज्वरच्छर्द्यतीसारहृदामयार्ताः, विबन्धगौरवोद्गारहृल्लासपीडिताश्च** ( अहृसू. १४.१२-१३ )

एक उपचार. दोष शरिराबाहेर घालवणे. उपचार प्रकार दोन. शोधक व शामक अशी दोन प्रकारची औषधे. शोधक ५ प्रकारचे. शोधकबस्ति, वांतीकरणारे, रेचक, डोक्याचे रेचक व रक्तस्राव. व्रणाच्या उपचारांत शोधन म्हणजे व्रणातील दुष्ट अशी पू इत्यादी द्रव्ये बाहेर काढणे. प्रकार आठ. काढा, वात, चटणी, तूप, तेल, घन, ( घन काढा ) चूर्ण व धूप. शोधन देण्यास योग्य रोगी— स्थूल, बलवान पित्त व कफ अधिक असलेले, आमदोष, ज्वर, ओकारी, अतीसार, हृद्रोग यांनी पिडलेले, अवरोध, जडपणा, ढेकर व घशाशी तोंडाला पाणी येणे यानी त्रस्त.

**दोषनिर्हरणं भेषजम्** ( चसू. १.१०९ )

दोष बाहेर काढणारे औषध.

पु., **वनस्पति॰ निम्बूकः** ( रा. ११.२२ ) निंबु.

**( शोधनी )**-स्त्री., **वनस्पति॰ नीलिनी** ( रा. ४.३४९ )

काळा दाणा.

**ताली** ( रापरि. ३.३७ )

लव असलेली तांबडी सूक्ष्म वेल.

**जेपालः** ( रा. ६.३४४ ) जयपाळ.

**-गण्डूष**-पु., **शोधनार्थं गण्डूषः** ( असंसू. ३१.४ ) **द्र॰ ' गण्डूष '**

तोंड व भोवतालच्या भागातील दोष बाहेर काढण्याकरिता करावयाच्या गुळण्या. शोधक गुळण्या.

**-द्रव्य**-न., **शोधनं द्रव्यम् यथा वचाकोशातकी निम्बपिप्पल्यादीनि द्रव्याणि** ( काखिल. २ )

शरीर शुद्ध करणारे द्रव्य. जसे वेखंड, कडु दोडके, कडु निंब, पिंपळी इत्यादी.

**-द्रव्यसंभृता**-वि., विरेचनद्रव्यनिर्मिता ( वर्तिः ) ( सुचि. ३७.११८ )

रेचक औषधांनी तयार केलेली. (वर्ती)

**-बस्ति**-पु., निरूहबस्तिः ( सुचि. ३५.१९ )

शोधक बस्ती. निरूह—आस्थापनबस्ती.

**-मार्ग**-पु., दोषनिर्हरणार्थमासन्नो मार्गः ( अहृसू. १३.३० )

शुद्ध होण्याचा रस्ता. दोषांना बाहेर काढण्यास जवळचा मार्ग.

**शोधनादिगणसंग्रह**-पु., अध्यायसंज्ञा० (अहृसू. १५)

अध्यायाचे नाव. शोधन करणाऱ्या व शामक औषधांच्या गणांचा संग्रह यात आहे.

**शोधनालेप**-पु., कल्प० व्रणशोधनार्थमालेपविशेषः ( असंउ. ३० )

जखमेचे शोधन करण्याकरिता लेप इत्यादी.

**शोधनीयगण**-पु., लोहादीनां शोधनकरं द्रव्यत्रयम्, काचः टङ्कणं शुक्तिश्चेति (र. १०.९६; र. ३६.३७)

लोखंड इत्यादी धातु तसेच इतर पार्थिव द्रव्याची शुद्धि करणाऱ्या तीन द्रव्यांचा गण. काच, टाकणखार, शिंप.

**शोफ**-पु., रोग० शोथः ( सुनि. १०.३ ) सूज.

शरीरैकदेशोत्थितः शोथः, द्र० ' व्रणशोथः व्रणशोफः ' (सुसू.१७.३) अवस्थाभेदेन स त्रिधा—आमः पच्यमानः पक्वश्च ( सुसू. १७.५ )

शरिराच्या कोणत्या तरी एका भागावर येणारी सूज. व्रणावरील सूज. अवस्थांच्या प्रमाणे तीन प्रकार. कच्ची, पचणारी—पिकणारी व पिकलेली.

**( शोफा )**-स्त्री., वनस्पति० हरिद्रा (रा. ६.८१) हळद.

**-क्रिया**-स्त्री., व्रणशोफचिकित्सा ( सुचि. १८.३ )

जखमेच्या सुजेचे उपचार.

**-घ्नी**-वनस्पति० पुनर्नवाभेदः, रक्तपुनर्नवा (रा. ५.४०७) द्र० ' पुनर्नवा '

पुनर्नवाप्रकार. तांबडा पुनर्नवा. पहा ' पुनर्नवा '.

शालिपर्णी ( रा. ४.११४ ) सालवण.

**-चिकित्सित**-वि., अध्याय० ( काचि. शोफचि. )

अध्यायाचे नांव. यात सुजेचे उपचार आहेत.

**-नाशन**-पु., वनस्पति० नीलः ( रापरि. ९.११ )

एक वनस्पती. नीलनामकवृक्ष.

**-हारिन्**-पु., वनस्पति० वनबर्बरिका (रा. १०.८८)

रानबाभूळ.

**शोफाभिवृद्धि**-स्त्री., शोफस्य समन्ततः प्रसारः ( सुशा. ६.२४ )

सूज भोवताली पसरणे.

**शोफित**-वि., शोफयुक्तम् ( चइ. १०.१५ ) सूजयुक्त.

**शोभना**-स्त्री., वनस्पति० वासन्ती ( ध. ५.१३९ )

वासंती, मोठी जाई.

हरिद्रा ( रा. ६.८१ ) हळद.

**शोभा**-स्त्री., वनस्पति० गोरोचना ( रा. १२.३३ )

गोरोचन.

**शोभाञ्जन**-पु., वनस्पति० शिग्रुभेदः, नीलशिग्रुः (रा. ७.६२; सुउ. ४५.१९) द्र० ' शिग्रु '

निळा शेवगा. पहा ' शिग्रु '.

**शोभाञ्जनक**—पु., वनस्पति० शिग्रुः ( सुचि. ७.२४; चसू. ४.१३ ) शेवगा.

**शोलिका**-स्त्री., वनस्पति० शोली ( रापरि. ७.१७ )

रानहळद.

**शोली**-स्त्री., वनस्पति० वनहरिद्रा, वन्यारिष्टा, शोलिका इत्यस्या अपरनामानि, गुणाः—कटुर्गौल्या तिक्ता रुच्या दीपनी च ( रापरि. ७.१७ )

हिं.—वनहलदी.

**म.—रानहळद, शोली.**

गु.—वनहलदर.

बं.—बनहलुद.

ता.—कस्तुरिमंजल.

रानहळद. गुण—गोड, कडु, तिखट, रुचि करणारी, अग्निदीपक. वन्यारिष्टा, शोलिका अशी दुसरी नावे आहेत.

**शोष**-पु., शुष्कता, वायोः कर्मस्वेकम् ( चसू. २०.१२; अहृसू. १२.५० )

शुष्कपणा, सुकणे, सुकेपणा, वाळणे, कोरडे होणे. वायूच्या कर्मांपैकी एक कर्म.

लक्षण० मुखगलयोः शुष्कता, अतिलङ्घनदोष० ( सुउ. ३९.१०५ ) पित्तज्वरलक्षणेष्वेकम् ( र. १२.१० )

अतिलंघनाने होणारा एक दोष. पित्तज्वराचे एक लक्षण. तोंड व घसा सुकणे, कोरडे पडणे.

रोग० गर्भशोषरूपो रोगः ( चशा. २.१५ ) वातशोषणेन विहतौजस्त्वाद्गर्भस्य शुष्कता, उपशुष्ककगर्भ इति वा ( सुशा. १०.५७; चशा. २.१५ )

गर्भशोष स्वरूपाचा एक रोग. गर्भ सुकणे, सुकलेला गर्भ. शोषणामुळे गर्भाचे ओज नष्ट होऊन तो सुकतो. उपशुष्कक असेही त्याला नाव आहे.

**रोग० शोषभेदाः–व्यवायशोषः, शोकशोषः, जराशोषः, व्यायामशोषः, अध्वशोषः, उपवासशोषः, व्रणशोषः, उरःक्षतशोषः च** ( सुउ. ४१.१६ ) **एते सर्वे शोषाः धातुक्षया एव; तेषां चिकित्सा धातुक्षयोक्तैव कर्तव्या** ( सुउ. ४१.२७ )

शोषाचे–क्षयाचे प्रकार. (१) संभोग (२) शोक (३) म्हातारपण (४) व्यायाम (५) वाटचाल (६) उपवास (७) व्रण (८) छातीत जखम. या आठ कारणामुळे होणारा क्षय. असे ८ प्रकारचे क्षय. हे सर्व धातूचे क्षय होत. त्यांची चिकित्सा धातु क्षयाला अनुसरूनच करावी.

**–द्वार**–न., **शोषस्य नाम राजयक्ष्मणः कारणम्** ( असंसू. १३.३ ) क्षयाचे कारण.

**–निदान**–न., **अध्यायसंज्ञा०** (चनि. ६.१ )

अध्यायाचे नाव. यात क्षयाची (रोगाची) माहिती आहे.

**–प्रतिषेध**–पु., **अध्यायसंज्ञा०** ( सुउ. ४१.१ )

अध्यायाचे नाव. यात क्षयाचे उपचार आहेत.

**शोषण**–वि., **व्रणस्यार्द्रभावनाशकः ( क्षारगुणः )** ( सुसू. ११.५ )

जखमेचा ओलावा नाहीसा करणारा, जखम कोरडी करणारा. (क्षाराचा धर्म).

न., **उपक्रम० द्रवभागविशोषणम् शुष्कत्वापादनम्** ( चचि. २७.२५ )

एक उपचार. ओलावा नाहीसा करणे, सुकवणे, द्रवांश शोषून घेणे.

**वनस्पति० शुण्ठी** (रा. ६.१३० ) सुंठ.

**शोषापहा**–स्त्री., **वनस्पति० क्लीतनकम्** (रा. ६.१८५)

एक प्रकारचा ज्येष्ठमध.

**शोषित**–वि., **श्रपितम् शुष्कीकृतम्** ( सुशा. ४.१९ )

सुकवलेले, कोरडे केलेले.

**शोषिन्**–वि., **शुष्कः** ( चशा. ८.२१ )

सुकलेले, कोरडे झालेले.

**शौकर**–वि., **शूकरस्य अयम् शूकरसम्बन्धि ( मांसादि )** ( चसू. ४.११ )

डुक्कराचे. डुक्कराचे मांस.

**–बस्ति**–पु., **शूकरस्य बस्तिः, बस्तियन्त्रार्थमुपयुज्यते** ( चसि. ३.१० )

डुक्कराचा मूत्राशय. बस्तीचे यंत्र बनवण्याला उपयुक्त.

**–मांस**–न., **शूकरमांसम्, तच्च गुर्वाहारद्रव्यम्** ( चसू. ५.११ )

डुक्कराचे मांस. ते आहारदृष्ट्या जड आहे.

**–रस**–पु., **शूकरमांसस्य रसः** ( चसू. १३.९०(१) )

डुक्कराच्या मांसाचा रस.

**शौकरीवसा**–स्त्री., **वराहमांसस्य स्नेहः** (चचि. ३०.८७) **महामृगवसानां श्रेष्ठा** ( असंसू. ६ )

डुक्कराची चरबी. डुक्कराच्या मांसाचा स्नेह. मोठ्या पशूंच्या चरबीत श्रेष्ठ अशी चरबी.

**शौक्तिक**–न., **वनस्पति० बदरीफलम्** ( चनि. २.४ )

बोरीचे फळ.

**शौक्तिज**–न., **भैषज्य० मौक्तिकम्** ( ध. ६.६२ )

मोती.

**शौक्तेयक**–न., **भैषज्य० शुक्तिप्रभवम् मौक्तिकम्** ( रा. १३.६७ ) मोती. ( शिंपल्यांत झालेले )

**शौच**–न., **शुचिकर्म** ( असंसू. ३.९ ) **शुचिता; तच्च द्विविधं बाह्यमाभ्यन्तरं च। तत्र बाह्यं स्नानादिकमाभ्यन्तरं मनःशुद्धिः श्रुतिस्मृतिविहितानुष्ठानं चेति** ( सुसू. ३.३ )

शुद्धिकार्य. शुद्धि दोन प्रकारची–बाह्य व आतली. स्नानादिकांनी बाह्य शुद्धि व वेद स्मृति यांनी सांगितलेले अनुष्ठान वरणे ही मनाची शुद्धि.

**–द्विष्**–वि., **शौचं द्वेष्टा, अशुचिः, शौचानभिलाषुकः** ( सुउ. ६०.१४ )

शुद्धीचा तिटकारा असलेला, पावित्र्याचा द्वेष्टा, अशुद्ध, अस्वच्छ.

**–द्वेष**–पु., **स्वच्छताया अप्रियत्वम् स्वच्छतानभिरुचिः** ( चनि. ७.७(३) )

शुद्धीचा—स्वच्छतेचा द्वेष, तिटकारा.

**–विधि**–पु., **स्मृत्युक्तविधिना मलोत्सर्गाद्याचमनपर्यन्तो विधिः** ( अहृसू. २.१ )

शुद्धीचा विधि. शुद्धीचा निश्चित कार्यक्रम. स्मृतीने सांगितलेल्या कार्यक्रमाप्रमाणे मळाचे विसर्जन करण्यापासून आचमनापर्यंतचा विधि.

**शौचाचार**–पु., **शौचमयो नाम शुद्धो धर्मनिष्ठापूत आचारः धर्मविहितमाचरणम्** ( सुशा. ३.३५ )

धर्माने सांगितलेला आचार.

**शौचाधान**–न., **शुद्धीकरणम्, पानीयेन मृदा च पादाद्यवयवानां मलमार्गाणां च शुद्धिः** ( चसू. ५.९८ )
शुद्धीकरण. हातपाय गुद मूत्रमार्ग यांना ओली माती लावून पाण्याने धुणे.

**शौण्डि**–स्त्री., **वनस्पति० पिप्पलीमूलम्** ( असंचि. १० )
पिंपळमूळ.
जूर्णा ( असंचि. १० ) जोंधळा.

**शौण्डी**–स्त्री., **वनस्पति० पिप्पली** ( ध. २.७३; ( र. २३.४० )
पिंपळी.
**कटभी** ( रापरि. ९.३७ )
मालकांगोणी, सिरसाच्या पानांसारखी वनस्पती.

**शौनक**–पु., **ऋषि०** ( चसि. ११.४ ) **यज्ञःपुरुषविषये विवदमानामेकतमः** ( चसू. २५.१५ ) **रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतःपार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः** ( चसू. १.१३ ) **गर्भस्य शिरः पूर्वं संभवतीति मतप्रतिपादकः** ( सुशा. ३.३२ )
एक ऋषि. पुरुषोत्पत्ति व रोगोपचार या विषयांचा वादविवाद व विचारविनिमय करण्याकरिता हिमालयाच्या उतरणीवर एकत्र बसलेल्या महर्षींपैकी एक. गर्भाचे शिर प्रथम निर्माण होते, असे प्रतिपादन करणारे.

**शौर्य**–न., **शूरत्वम्** ( सुसू. २.३ ) **निर्भयत्वम्, भीतो हि साध्यमपि व्रणमवगाढमूलं नारभते आरब्धं वाऽत्यवशेषयति । वैद्यस्य शस्त्रकर्मणि एकः प्रशस्तगुणः** ( सुसू. ५.१० ) **सर्वकर्मस्वविषादिता, असौ सत्त्वसारस्य गुण एकः** ( सुसू. ३५.१६ )
शूरत्व, शूरपणा, निर्भयत्व. भित्रा वैद्य खोल साध्य जखमही उपचाराला हातात घेत नाही, किंवा उपचाराला आरंभ केल्यानंतर मध्येच सोडतो. वैद्याचा शस्त्रकर्मातील एक प्रशस्त गुण शौर्य हा आहे. कोणत्याही कामामध्ये न खचणे, मन न कचरणे, हा सत्वसारत्वाचा एक गुण आहे.

**शौषिर**–पु., **रोग० दन्तमूलगतरोगः, लक्षणम्–कफरक्तजो दन्तमूलेषु रुजावान् शोफो भवति, स लालास्रावी कण्डूमांश्च भवति** ( सुनि. १६.१८ ) **तस्य चिकित्सा–रक्तमोक्षणं, कषायौषधैर्लेपः, क्षीरिणश्च वृक्षा गण्डूषार्थम्, सिद्धसर्पिर्नस्यार्थम्** ( सुचि. २२.१६-१८ )
दातांच्या मुळांतील एक रोग. कफ व रक्त यांनी दातांच्या मुळाशी वेदनायुक्त सूज होते, लाळ सुटते, खाज येते. उपचार— रक्त काढणे, तुरट औषधांनी लेप, दुधाळ वृक्षाच्या सालींच्या गुळण्या व औषधितूप नाकात घालणे.

**शौषिर्य**–न., **छिद्रभावः, यदाकाशीयं द्रव्यं तन्मार्दवसौषिर्यलाघवकरम्** ( सुसू. ४१.४(५) )
पोकळी, पोकळपणा, छिद्रत्व. आकाशगुणभूयिष्ठ द्रव्य. मृदुपणा, पोकळी व हलकेपणा निर्माण करते.

**श्चोतन**–न., **आश्चोतनम्** ( काखिल. १३.४० )
डोळ्यात औषध घालणे.

**श्मशान**–न., **मृतस्य दाहनिखननाद्यन्त्यसंस्कारस्थानम्** ( सुशा. १०.३; अहसू. २.३८ )
प्रेताला जाळणे, पुरणे, इत्यादी शेवटला संस्कार करण्याचे स्थान.

**श्मश्रु**–स्त्री., **पुंमुखे प्रवृद्धा रोमराजिः** ( असंशा. २ ) **'दाढी' इति मराठी भाषायाम्**
पुरुषाच्या तोंडावरचे केश. दाढी, मिशा.
**–कर्मन्**–न., **श्मश्रुकल्पनविधिः** ( असंशा. १२.१९ )
दाढी करणे, मिशा काढणे.
**–दोष**–पु., **श्मश्रुविकारः, अस्थिप्रदोषजरोगेष्वेकः** ( चसू. २८.१६ )
पुरुषाच्या तोंडावरील केसांचा विकार. अस्थि धातूच्या विकारांपैकी एक.

**श्माशानिकशकुनि**–पु., **पक्षि० गृध्रः** ( चवि. ३.७(३) )
स्मशानांतील एक पक्षि. गिधाड.

**श्याम**–वि., **ईषत्कृष्णम्** ( सुचि. १.३२ )
सावळा, थोडा काळा, काळसर.
पु., **वनस्पति० धत्तूरः** ( रा. १०. ११ ) धोतरा.
**असनः** ( ध. ५.१२५ ) असाणा.
( **श्याम** ) **श्यामाकः** ( रा, १६.१४० )
सांवा, वऱ्याचे तांदूळ.
**पीलुः** ( ध. ५.११ ) पीलु.
न., **मरिचम्** ( ध. २.८८ ) मिरे.
वि. **वर्ण० ईषत्कृष्णम्** ( सुचि. १.३२ )
रंग थोडा काळा, काळा सावळा, सावळा.

( **श्यामा** )–स्त्री., **वनस्पति० कस्तूरिका** ( रा. १२.४७ )
कस्तूरी.
**प्रियङ्गुः** ( ध. ३.१६; सुचि. ३७.२७ ) गव्हला.
**हरिद्रा** ( रा. ६.८१; र. ५.१९७ ) हळद.
**वटपत्री** ( रा. ५.२११ ) मोगरी, मोगरा.
**वृक्षादनी** ( रा. ५.१४२ ) बांडगुळ.

दूर्वाभेदः नीलदूर्वा ( रा. ८.२२६ ) द्र० 'दूर्वा'
निळी दूर्वा, दूर्वा प्रकार.
गुडूची ( रा. ३.१ ) गुळवेल.
पद्मबीजम् ( रा. १०.२५६ ) कमळबीज, कमळाक्ष.
पुनर्नवाभेदः नीलपुनर्नवा ( रा. ५.४१० )
द्र० 'पुनर्नवा'
निळा पुनर्नवा, पुनर्नवाप्रकार. पहा 'पुनर्नवा'
पिप्पली ( ध. २.७३ ) पिंपळी.
गोरोचना ( रा. १२.३४ ) गोरोचन.
नीलिनी ( रा. ४.३४९ ) काळा दाणा.
तुलसी ( रा. १०.७८ ) काळी तुळस.
वृद्धदारुः ( सुसू. ४५.१२४; सुचि. ३७.४० )
वरधारा.
त्रिवृद्भेदः, श्वेतत्रिवृत् ( सुसू. ३८.२९ ) द्र०
'त्रिवृत'.
तेडाचा प्रकार. पांढरे तेड. पहा निशोत्तर 'त्रिवृत्'
त्रिवृद्भेदः, श्याममूला त्रिवृत् ( चसू. १.७७;
अहृसू. १५.४५; सुचि. २०.५०-५१ )
द्र० 'त्रिवृत्'
काळ्या मुळाचे तेड. निशोत्तर, तेडाचा प्रकार. पहा
'त्रिवृत्'
त्रिवृद्भेदः, अरुणमूला त्रिवृत् ( सुउ. ४२.९४ )
द्र० 'त्रिवृत्'
लाल रंगाचे तेड, निशोत्तर, पहा 'त्रिवृत्'.
त्रिवृत् ( ध. १.२४३; असंसू. ७; चक. ७.४ )
तेड. निशोत्तर,
पक्षि० पिङ्गला ( असंशा. १२.९ )
पक्षी. पिंगळा, घुबड.

**–कन्दा**–स्त्री., वनस्पति० अतिविषा ( ध. १.१० )
अतिविष.

**–काकुलीमृग**–पु., सर्प० 'मालुयासर्प' इति ख्यातस्य भेदः ( चसू. २७.३७ ) एक सर्प.

**–काण्डा**–स्त्री., वनस्पति० दूर्वाभेदः, गण्डदूर्वा ( रा. ८.२३४ ) द्र० 'दूर्वा'
दूर्वा प्रकार, कांड्यांची दूर्वा. पहा 'दूर्वा'

**–ग्रन्थि**–स्त्री., वनस्पति० दूर्वाभेदः, गण्डदूर्वा ( रा. ८.२३४ ) द्र० 'दूर्वा'
कांड्यांची दूर्वा. दूर्वाप्रकार. पहा 'दूर्वा'.

**–त्व**–न., श्यामवर्णत्वम् ( असंशा. १ )
श्यामवर्णत्व, सावळेपणा.

**–वंश**–पु., वनस्पति० इक्षुभेदः, कृष्णेक्षुः ( रा. १४.१८७ ) द्र० 'इक्षु'
काळा ऊस. उसाचा प्रकार. पहा 'इक्षु'.

**–वर्ण**–पु., वनस्पति० शिरीषः ( ध. ५.११२ )
शिरस.

**–शालि**–पु., स्त्री., वनस्पति० शालिभेदः, कृष्णशालिः ( रा. १६.८६, ) द्र० 'शालि'.
साळीचा प्रकार. काळी साळ. पहा 'शालि'

**–सार**–पु., वनस्पति० खदिरसारः, कृष्णवर्णनिर्यासः ( ध. १.२७ ) द्र० 'खदिर'
खैराचा शिरा. काथ. पहा 'खदिर'.

**श्यामक**–न., वनस्पति० कत्तृणम् ( ध. १.८० )
रोहिस गवत.
श्यामाकः ( रा. १६.१४०; अहृसू. ६.११ )
सावा. वऱ्याचे तांदूळ.

**( श्यामिका )**–स्त्री., खनिज० मनःशिला ( र. ३.९६-९७ )
मनशीळ.

**श्यामल**–पु., वनस्पति० शिरीषः ( रा. ९.१८९ )
शिरस.
पिप्पलः ( ध. ५.७८ ) पिंपळ.
भृङ्गराजः ( रा. ४.२२ ) माका.

**( श्यामला )**–स्त्री., वनस्पति० अश्वगन्धा (रा. ४.४०१)
आसकंद.
कटभी ( रापरि. ९.३७ )
मालकांगोणी. सिरसाच्या पानासारखी एक वनस्पती.
जम्बूः ( रा. ११.१२८ ) जांभूळ.

**( श्यामली )**–स्त्री., भैषज्य० कस्तूरिका (रा. १२.४८)
कस्तूरी.

**–च्छद**–पु., वनस्पति० पिप्पलः ( ध. ५.७९ )
पिंपळ.

**–तृणा**–वि., श्यामलानि तृणानि यस्याः ( असंसू. ४.४२ )
जिच्यावर निळे हिरवे गवत आहे अशी ( जमीन ).

**श्यामलालुक**–पु., वनस्पति० नीलालुः (रापरि. ७.३२)
निळा अळू, काळा अळू.

**श्यामलिका**–स्त्री., वनस्पति० नीलिनी (रा. ४.३५१)
काळा दाणा.

**श्यामलेक्षु**–पु., वनस्पति० इक्षुभेदः, कृष्णेक्षुः
(रा. १४.१८७) द्र० 'इक्षु'
काळा ऊस. पहा 'इक्षु'

**श्यामा**–स्त्री., (रा. १२.४७) तेड. एक प्रकार.

**–त्रिवृत्कल्प**–पु., त्रिवृद्भेदः एव श्यामा। तेन श्यामायास्त्रिवृतश्च कल्पः श्यामात्रिवृत्कल्पः (चक. ७.१)
श्यामा तेडाचा एक प्रकार. दोन प्रकारच्या तेडांचा एक कल्प.

**–द्वय**–न., वनस्पति० पिप्पली, प्रियङ्गुश्च (असंउ. ४४)
पिंपळी व गव्हला ही श्यामाजोडी.

**श्यामाक**–पु., तृणधान्य० सामान्यतः सर्वप्राणिनां पथ्यः (सुसू. २०.५; चसू. २.२६) इदं कुधान्यम् कषायमधुरो लघुर्वातलः कफपित्तघ्नः शीतः संग्राही शोषणश्च (चसू. २७.१६) श्यामाकस्त्रिविधः– तोयश्यामाक उष्ट्रश्यामाको हस्तिश्यामाकश्चेति (सुसू. ४६.२१; अहसू. ६.११) गुणाः– मधुरः कषायः शीतः स्निग्धो लघुर्वातकरः संग्राही कफपित्तघ्नो विषघ्नश्च (ध. ६.८८)
हिं.—शामा.
**म.—सांवे.**
गु.—सामो.
बं.—श्यामाधास.
ता.—श्यामाख.
सांवा, सांवे, वऱ्याचे तांदूळ. एक गवती धान्य. सामान्यतः सर्व प्राण्यांना पथ्यकर आहे, हे हलक्या प्रतीचे धान्य आहे. कदन्न आहे. **गुण**—गोड, तुरट, हलके, थंड, मळ बांधणारे व शुष्क करणारे, विषघ्न, स्निग्ध, कफपित्त नाशक पण वातूळ आहे. प्रकार तीन (१) पाणसावा (२) उंटसावा (३) व हत्तीसावा.

**श्यामाङ्गि**–स्त्री., खनिज० मनःशिलाप्रकारः (र. ४.९६) द्र० 'मनःशिला'
मनशीळप्रकार. पहा 'मनःशिला'.

**श्यामादिगण**–पु., श्यामामहाश्यामात्रिवृद्दन्तीशङ्खिनीतिल्वककम्पिल्लकरम्यकक्रमुकपुत्रश्रेणीगवाक्षीराजवृक्षकरञ्जद्वयगुडूचीसप्तलाच्छगलान्त्रीसुधाः सुवर्णक्षीरी चेति, गुणाः–असौ गणो गुल्मविषापहः आनाहोदरविड्भेदी उदावर्तनाशनश्च
(सुसू. ३८.२९; चवि. ८.१३६; अहसू. १५.४५; असंसू. १६)
एक गण. पांढरे तेड, वरधारा, तांबडे तेड, दांती, सांखवेल, रोध्र, कपिला, मोठा निंब, सुपारी, एरंडाप्रमाणे पानांची लहान वनस्पती, (शंबरी-द्रवंती) कवंडळ. बहावा, दोन्ही करंज, गुळवेल, वरधारा प्रकार, त्रिधारी निवडुंग, सातला (निवडुंगाचा प्रकार). व कंकुष्ठ. गुण— गुल्म, विष, पोटफुगी, उदर, मळमूत्रवेग अडवल्याचे विकार नाशक व मळ फोडतो.

**श्यामादिलेप**–पु., योग० सविषआलेप० श्यामेन्द्रगोपासोमोत्पलानां लेपः सविषान्नस्य हस्तस्पर्शे हस्तदाहे नखशाते च शस्यते (सुक. १.३७)
तेड इत्यादींचा लेप. गव्हला, कवंडळ, अनंतमूळ, गुळवेल, निळे कमळ यांचा लेप. विषयुक्त अन्नाच्या स्पर्शाने हाताची आग, नखे गळणे यावर उपयुक्त.

**श्यामादिसिद्धघृत**–न., सिद्धघृत० श्यामा गिरिह्वाञ्जनकीरसेक्षुद्राक्षारसेसप्तलिकारसेक्कीतककल्केन सामान्यस्नेहपरिभाषया सिद्धं घृतम्। पित्तार्बुदे पित्तोदरे चोपयुज्यते (सुचि. १८.३४)
तेड इत्यादींनी सिद्ध तूप. पांढरे तेड, उंदीरकानी, काळी कपाशी, द्राक्ष, रान रीठा यांचा रस व ज्येष्ठमधाची चटणी यांनी तयार केलेले तूप. पित्तज उदर व पित्ताच्या अवाळूवर उपयुक्त.

**श्यामेक्षु**–पु., वनस्पति० इक्षुभेदः, कृष्णेक्षुः
(रा. १४.१८७) द्र० 'इक्षु'.
काळा ऊस. उसाचा प्रकार. पहा 'इक्षु'

**श्याव**–वि., वर्ण० ईषत्कृष्ण अरुणभस्मकपोतास्थिवर्णोपलक्षकः (सुउ. ४०.९-१०; सुशा. २.२५; सुसू. १४.२१)
व्रणाचा रंग. थोडा काळा, अरुण, भस्म, पारवापक्ष्याचे हाड यांच्या रंगाच्या अर्थी हा शब्द येथे आहे.
पु., रोग० कर्णवेधापयोगेन जायमान उपद्रवविशेषः (सुसू. १६.२६(११))
कान विंधताना–टोंचताना झालेल्या चुकांनी होणारा रोग. कान काळा होणे.
दन्तरोग० दन्तो रक्तादिभिः श्याववर्णो भवति यस्मिन्स रोगः (असंउ. २५)
दाताचा रोग. काळा दात. ज्या रोगात रक्त इत्यादी दुष्ट झाल्यामुळे दात काळसर वर्णाचा होतो तो.

**–कर्दम**–पु., नेत्ररोग० अयं साध्यः (सुउ. १.४१)
डोळ्याचा रोग. हा साध्य आहे.

**-गन्ध**-पु., दध्यादेस्ताम्रघृष्टसमानं गन्धमाहुः; केचित्तु 'शाव' मिति पठन्ति, शवस्य गन्धः शावः गन्धः ( चचि. चक्र. २५.२७ )
एक प्रकारचा वास. दही इत्यादी तांब्याच्या भांड्याला घासल्यावर येणारा वास. शवाचा-प्रेताचा गंध (वास) कित्येक शावगंध म्हणतात.

**-जिह्व**-वि., श्यावजिह्वः, ऋतुमत्या अतिहसनाद्गर्भः श्यावजिह्वो भवति ( सुशा. २.२५ )
काळसर जीभ असलेला. पाळीच्या काळात अतिशय हसण्याने गर्भ काळ्या जिभेचा होतो.

**-तालु**-वि., श्यावतालुः, ऋतुमत्या अतिहसनाद्गर्भः श्यावतालुर्भवति ( सुशा. २.२५ )
काळसर टाळु असलेला. पाळीच्या काळात अतिशय हसण्याने गर्भ काळ्या टाळूचा होतो.

**-दन्त**-वि., श्यावदन्तवान् ऋतुमत्या अतिहसनाद्गर्भः श्यावदन्तो भवति ( सुशा. २.२५ )
काळसर दाताचा. पाळीच्या काळात अतिशय हसण्याने गर्भ काळ्या दाताचा होतो.
वि., कृष्णरदनः विसूच्यादीनामसाध्यलक्षणम् ( सुउ. ५६.११ )
काळे दात झालेला, विसूचिकेत असाध्य लक्षण.

**-दन्तक**-पु., दन्तरोग० लक्षणम्-यो दन्तोऽसृजा मिश्रेण पित्तेनाशेषतो दग्धः श्यावतामपि गतः स श्यावदन्तको रोगः ( सुनि. १६.३४ )
दाताचा रोग. काळा दात. लक्षण-रक्त व पित्त दोषांनी सर्व दात जळाल्यासारखे व काळे होतात तो रोग.

**-मण्डल**-न., ईषत्कृष्णं मण्डलम् वातरक्तगतमेकं लक्षणम् ( सुचि. ५.४ )
काळे मंडळ, चकंदळ, वातरक्त या रोगांतले एक चिन्ह.

**-मार्जारवसा**-स्त्री., कृष्णमार्जारस्य मांसस्नेहः नेत्ररोगेष्वञ्जनार्थमुपयुज्यते ( असंउ. १६ )
काळ्या मांजराची चरबी. डोळ्याच्या रोगात अंजन करण्याकरिता योजतात.

**-वर्त्मन्**-न., नेत्ररोग० यत्र नेत्रवर्त्म बाह्यतोऽन्तश्च श्यावं शोफयुक्तं वेदनायुक्तं दाहकण्डूपरिक्लेदयुक्तं भवति। अयं साध्यो रोगः ( सुउ. ३.२०; असंउ. ११; सुउ. १.४१ )
काळी पापणी. पापणीचा रोग. ज्यात डोळ्याची पापणी बाहेरून व आतून काळी सूज, वेदना, दाह, खाज, गळ, यांनी युक्त होते तो रोग. हा साध्य आहे.

**श्यावाङ्गता**-स्त्री., लक्षण० शरीरस्य कृष्णारुणवर्णत्वम् यकृत्विद्धस्य विवर्णता० ( सुशा. ९.१२ )
काळसर अंग असणे, यकृताचा वेध झाल्याने अंग काळसर पडते.

**श्यावारुणवर्णता**-स्त्री., लक्षण० श्यावारुणस्य वर्णस्य सत्त्वम् दर्शनं वा वायोः कर्म ( असंसू. २० )
त्वचेला काळसर तांबुस रंग येणे, दिसणे. हे दुष्ट वाताचे कर्म.

**श्यावारुणावभासता**-स्त्री., रोग० त्वचि कृष्णारुणत्वयोरवभासनम्, अशीतिवातविकारेष्वेकः ( चसू. २०.११ )
त्वचा काळसर तांबुस भासणे. ऐशी वातविकारांतील एक.

**श्यावौष्ठ**-वि., श्याव ओष्ठो यस्य सः श्यावदन्तौष्ठनखत्वं विसूच्यादीनामसाध्यलक्षण० ( सुउ. ५६.११ )
काळ्या ओठाचा. ओठ, नखे, दात काळे होणे हे विषूचिकेचे असाध्य लक्षण आहे.

**श्येन**-पु., प्रसहपक्षि० ( चशा. ८.२८; चसू. २७.३६ ) स प्रतुदः ( रा. १७.३ ) शशनकः सिञ्चानो गरुडान्वयः ( सुसू. ४६.७४; सुचि. ३५.७ )
हिं.—बाज.
**म.—ससाणा.**
बं.—बाज.
द्र० 'प्रसह'
ससाणा. भक्ष्य टोचून खाणारा आक्रमक पक्षी. ( सिंचानामक गरुडासारखा पक्षी. )

**-घण्टा**-स्त्री., वनस्पति० दन्ती ( रा. ६.३३८ )
दांती.

**-मुख**-न., स्वस्तिकयन्त्र० श्येनमुखसदृशं यन्त्रम् ( सुसू. ७.१० )
ससाण्याच्या तोंडासारखे यंत्र.

**श्येनादियाग**-पु., याग० शत्रोर्वधार्थं क्रियमाणा अभिचारप्रयोजनका यागाः ( असंसू. ९.११४ )
ससाणा इत्यादी बळी देऊन करावयाचा यज्ञ. शत्रूचा वध करण्याकरिता केला जाणारा जारण-मारणकर्मात्मक यज्ञ.

**श्योनाक**-पु., वनस्पति० टिण्टुकः ( चसू. २.११; चसू. ४.१३,१७ )
टेंटु.

**-तैल**-न., तैल० तस्य विधिरुपयोगश्च बलातैलवत् कर्तव्यः ( का. धात्रीचिकित्सा. )
टेंटूचे तेल. बला ( चिकणा ) तेलाप्रमाणे तयार करावे व त्याप्रमाणेच उपयोग करावा.

**श्रद्धा**-स्त्री., मनोभाव० इच्छा ( चशा. ४.१६ ) श्रद्धामभिप्रायेण परीक्षेत ( चवि. ४.८,१० )
मनाचा भाव, श्रद्धा, इच्छा. मनाच्या अभिप्रायाने श्रद्धेचे परीक्षण करावे.
अन्नग्रहणेच्छा, 'अम्लो रसः श्रद्धामुत्पादयति' ( सुसू. ४२.९ )
अन्न खाण्याची इच्छा. आंबट रस हा अन्नाची इच्छा उत्पन्न करतो.

**-भोज्य**-न., इच्छाभोजनम्, श्रद्धोत्पादकं भोज्यम् ( का. विशेषकल्पाध्याय. )
खाण्याची इच्छा होईल असे जेवण. इच्छाभोजन.

**श्रपण**-न., क्वथनम् ( चचि. १९.८५ )
कढणे, उकळणे, शिजणे.

**श्रम**-पु., श्रान्तिः, कर्मण्यन्यस्मिन्नक्षमत्वम् ( चनि. १.२१ ) बह्वायासकृतः कष्टः (सुसू.४५.३)
थकवा. दुसरे काम करण्याचे सामर्थ्य नसणे. पुष्कळ श्रम केल्याने सामर्थ्य खर्च झाल्यामुळे आलेला थकवा.
रोग० अशीतिवातविकारेष्वेकः ( कासू. २७.१९)
रोग. श्रम न करतांही थकवा वाटणे.
लक्षण० अयं स्वल्पायासेन परिलक्ष्यः ( चसू. १६.१४ )
लक्षण. थकवा. हा थोड्याशा हालचालीनेही दिसून येतो.

**-घ्नी**-स्त्री., वनस्पति० क्षीरतुम्बी ( रा. ७.२३९ )
दुधी, दुध्या भोपळा प्रकार.

**-नाशनवर्ग**-पु., द्रव्यगण० श्रमनाशकराणां द्रव्याणां वर्गः दाडिमफल्गुपरुषकप्रियालयवषष्टिकेक्षुबदरद्राक्षाखर्जूराश्चेति ( असंसू. १५ )
थकवा नाशक द्रव्यांचा गण— डाळिंब, काळा उंबर, फालसा, चारोळी, जव, साठे तांदूळ, ऊस, बोर, द्राक्ष, खजूर.

**-निःश्वासधारण**-न., श्रमेण यः श्वासो भवति तस्य निग्रहः तेन गुल्माद्या रोगा भवन्ति ( चसू. ७.२४ )
परिश्रम केल्याने जो श्वास लागतो तो रोकणे. त्याने गुल्म इत्यादी रोग होतात,

**-भञ्जनी**-स्त्री., वनस्पति० ताम्बूली ( धपरि. ३.३ )
विड्याचे पान. विड्याच्या पानाची वेल.

**-श्वास**-पु., लक्षण० द्रुतगमन-बलवद्विग्रह-भारोद्वहनादिभिः श्रमैः समुत्पन्नः श्वासः ( सुउ. ५५.३५ )
परिश्रमांनी लागलेला श्वास. लवकर चालणे, धावणे, बलवानांशी झुंज देणे, वजन उचलणे, इत्यादी श्रमांनी उत्पन्न झालेला श्वास.

**-श्वासरोधजरोग**-पु., अध्वव्यायामादिना साहसेन सद्यो जातः श्वासः श्रमश्वासः। तद्वेगविधारणाद्गुल्महृद्रोगसंमोहा जायन्ते। तत्र विश्रमणं वातघ्ना चिकित्सा च हिता ( अहृसू. ४.१४ )
बाटचाल व्यायाम इत्यादींनी साहसाचे श्रम केल्याने लगेच तात्पुरता झालेला श्वास. तो श्रमश्वास; तो रोकला तर गुल्म, हृद्रोग, मूर्च्छा होतात. त्या वेळी पूर्ण विश्रांति, वातघ्न उपचार हितकर.

**-श्वासातुर**-वि., श्रमजन्यवेगोद्भूतश्वासविधारणजोदावर्तपीडितः ( सुउ. ५५.३५ )
श्रमाने उत्पन्न झालेला श्वास रोकल्यामुळे उत्पन्न झालेल्या उदावर्ताने पीडिलेला रोगी.

**-हरवर्ग**-पु., पञ्चके महाकषायवर्गे एको वर्गः, श्रमनाशनवर्गः ( चसू. ४.८,१६ )
श्रमहारक द्रव्यांचा वर्ग. पहा 'श्रमनाशक वर्ग.'

**श्रमित**-वि., श्रान्तः ( चचि. २८.३२ )
थकलेला, दमलेला.

**श्रवण**-पु., वनस्पति० इङ्गुदी ( सुचि. ३१.५ )
हिंगणबेट.
न., कर्णः ( अहृसू. २.९ ) कान.

**( श्रवणा )**-स्त्री., वनस्पति० मुण्डी ( रा. ५.२१७ )
मुंडी, गोरखमुंडी.

**-शीर्षिका**-स्त्री., वनस्पति० मुण्डीका (ध.१.१५९)
मुंडी.

**-स्रोतस्**-न., कर्णरन्ध्रम् कर्णयोर्द्वे रन्ध्रे बहिर्मुखे स्रोतसी ( सुशा. ५.१० )
कानाचे भोक, कानाची भोके दोन. बहिर्मुख स्रोतसे-मार्ग.

**श्रवणापाङ्गान्तर**-न., कर्णापाङ्गयोरन्तरम् तत्पञ्चाङ्गुलम् ( सुसू. ३५.१२ )
डोळ्याचा कानाकडील कोपरा व कान यातील अंतर, ते पाच अंगुळे असावे.

**श्रवणावरोध**–पु., लक्षण० **बाधिर्यम्** ( सुउ. ५५.१६ )
बहिरेपणा.

**श्रवणाह्वया**–स्त्री., वनस्पति० **मुण्डिकाचूर्णं व्रणरोपणार्थमुपयुज्यते** ( सुसू. ३७.२७ )
मुंडी. व्रण भरून आणण्यासाठी उपयुक्त.

**श्राद्ध**–वि., **श्रद्धाहेतुत्वेन विद्यते अस्येति श्राद्धः कफप्रकृतिपुरुषलक्षणेष्वेकं लक्षणम्** ( असंशा. ८.१६ )
श्रद्धेने जे असते ते श्रद्धायुक्त. कफप्रकृतीच्या मनुष्याच्या लक्षणांपैकी एक.

**श्रान्त**–वि., **द्रुतगमनादिना खिन्नः** ( सुउ. ५५.१७ )
थकलेला, दमलेला. तीव्र वेगाने चालणे धावणे इत्यादींनी कष्टी झालेला.
पु., **रोगलक्षण० तद्वान्, अस्वेद्योऽयम्** ( चसू. १४.१७ )
थकलेल्याला स्वेदन करू नये.

**श्रावणाह्वा**–स्त्री., वनस्पति० **मुण्डी** (ध. १.१५९) मुंडी.

**श्रावणी**–स्त्री., वनस्पति० **मुण्डी** ( चचि. २८.१५९; सुचि. ३०.५; ध. १.१५९ )
मुंडी.

**–युग**–न., वनस्पति० **श्रावणी महाश्रावणी च** ( अहृसू. १०.२४ )
मुंडी, महामुंडी.

**श्री**–स्त्री., वनस्पति० **बिल्वः** ( र. ११.५२,५७ ) बेल.
**ऋद्धिः** (रा. ५.१८८ )
अष्टवर्गापैकी एक वनस्पती.
**श्रीवेष्टको नवनीतधूपः** ( सुउ. २४.२७ )
राळेचा धूप, गुग्गुळ.
**लवङ्गम्** ( सुचि. २२.६९ ) लवंग.

**–कण्ठ**–पु., पक्षि० **श्येनः** ( असंशा. १२ ) ससाणा.

**–कन्दा**–स्त्री., वनस्पति० **वन्ध्यकर्कोटकी** (रा. ३.२७३)
वांझकर्टोली.

**–कृष्णदेव**–पु., ऋषि० **रसरत्नसमुच्चयकर्त्रा निर्दिष्टः कश्चित् प्राचीनो रसाचार्यः** ( र. ११.१३१ )
प्राचीन रसशास्त्रातील आचार्य.

**–केतन**–न., खनिज० **सुवर्णम्** ( ध. ६.२ ) सोने.

**–खण्ड**–न., वनस्पति० **चन्दनम्**—(रा.१२.१) चंदन.
**सितचन्दनम्** ( र. २२.७२ ) द्र० ' चन्दन '
पांढरे चंदन.

**–ताल**–पु., वनस्पति० **ताल०** ( रा. ९.९५ ) ताड.

**–देवी**–स्त्री., वनस्पति० **कर्कटीपत्राकारा 'देवी'–नाम्नी लता** ( र. ११.५२-५७ )
काकडीच्या पानांसारखी वेल. देवी हे दुसरे नाव.

**–धूप**–पु., धूप० ( का.धूपकल्पाध्याय. )
एक प्रकारचा धूप.

**–निकेत**–न., धूप० **नवनीतधूपः सरलनिर्यासः** ( सुचि. ९.१२ )
सरळ देवदाराचा डिंक.

**–निवास**–पु., निर्यास० ( **गन्धाविरोजा इति लोके** ) ( चचि. २८.१५३ )
गंधाबिरोजा.

**–निवासक**–पु., वनस्पति० **कुरण्टकः** ( असंचि.२३ )
कोऱ्हांटी.

**–पद्म**–न., वनस्पति० **कमलम्** ( रा. १०.२४३ )
कमळ.

**–पर्णी**–स्त्री., वनस्पति० **कट्फलम्** ( ध. १.७३; चचि. ३.२५८ )
कायफळ.
**काश्मरी** ( सुउ. १२.११,१२; चचि. ८.१२९; ध. १.११७ )
शिवण.
**अग्निमन्थः** ( ध. १.११० )
अरणी. पांढरी टाकळी.

**–पर्णीतैल**–न., तैल० **काश्मरीतैलम्, एतत् पित्तश्लेष्मप्रशमनम्** ( असंसू. ६ )
शिवणीचे तेल. हे पित्तकफनाशक.

**–पर्वत**–पु., पर्वत० **अत्र 'चन्द्रमा' इति सोमविशेष उपलभ्यते** ( सुचि. २९.२७ )
ह्या श्री पर्वतावर ( मल्लिकार्जुन पवित्रस्थान ) चंद्रमा नावाची सोमवल्ली सापडते.

**–पुष्प**–न., वनस्पति० **प्रपौण्डरीकम्** ( ध. ३.९२ )
कमळ .
**लवङ्गम्** ( ध. ३.४१ ) लवंग.

**–फल**–पु., वनस्पति० **राजादनः** ( रा. ११.१४७ )
खिरणी, चार.
न., **बिल्वः** ( र. १०.७३ ) बेल.
**आमलकम्** ( ध. १.२१५ ) आवळा.

**–( फला )**–स्त्री., वनस्पति० **नीलिनी** ( रा. ४.३४९)
काळा दाणा.

**(–फली )**–स्त्री., वनस्पति० **तेजोवती** ( रा. ३.२९३ )
मालकांगोणी प्रकार.

**-फलाह्व**-पु., वनस्पति० बिल्वः ( ध. १.१०६ )
बेल.

**-फलिका**-स्त्री., वनस्पति० **नीलिनी** ( ध. १.२३२ )
काळा दाणा.
**महानीली** ( रा. ४.३५३ ) मोठा काळा दाणा.
**कुड्डुञ्ची** ( रा. ७.२८२ ) एक वनस्पती.

**-रस**-पु., वनस्पति० श्रीवेष्टकः ( रा. १२.१९२ )
राळ, धूप.

**-वल्ली**-स्त्री., वनस्पति० वार्षिकी
( रा. १०.२२९; पृ. १९७ )
एक सुगंधी वनस्पती.
**गुणाः-कटुकाऽम्ला वातकफापहा शोफघ्नी च । तत्फलं तैललेपघ्नमत्यम्लं परं रुचिकृत्**
( रापरि. ८.३३.३४ )
काटेरी, आंबट, तिखट फळाची तीन पुडाचे तिकोनी फळ येणारी वनस्पती. गुण—तिखट, आंबट, सूज नाशक, वातकफनाशक. फळ अतिशय आंबट, अतिशय रुचकर. तेलाचा ओशटपणानाशक.

**-वाटा**-स्त्री., वनस्पति० **ताम्बूली** ( रा. ११.७ )
विडयाच्या पानांची वेल.

**-वाटी**-स्त्री., वनस्पति० **ताम्बूली** ( रा. ११.७ )
विडयाच्या पानांची वेल.

**-वारक**-पु., वनस्पति० **शितिवारः** ( ध. १.१५५ )
कुरडू.

**-वास**-पु., वनस्पति० **श्रीवेष्टकः** ( ध. ३.१३३ )
धूप, राळ.

**-वासक**-पु., वनस्पति० **श्रीवेष्टकः** ( असंसू. १६;
अहसू. १५.४३ )
धूप, राळ.

**-वासुदेव**-पु., ऋषि० **रसरत्नसमुच्चयकर्त्रा निर्दिष्टः प्राचीनो रसाचार्यः** ( र. १६.६७ )
प्राचीन रसशास्त्रातील आचार्य.

**-विभूषण**-पु., भैषज्य० **शङ्खः** (ध. ३.१७९) शंख.

**-वेष्ट**-पु., वनस्पति० **श्रीवेष्टकः** ( र. २१.६० )
धूप, राळ.

**-वेष्टक**-पु., वनस्पति० **सरलवृक्षनिर्यासः, नवनीतधूपः प्रियङ्ग्वादिगणेष्वेकः** ( सुचि. ११.१० )
**पुरीषविरजनीयगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१५ )
**सरलरसः नवनीतपिण्डप्रायः गुग्गुलीति लोके प्रसिद्धः, व्रणधूपनद्रव्येष्वेकं द्रव्यम्** (सुसू.३७,२१)
आ को, म, १८९

**धूमपाने उपयुक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ५.२३ )
**एलादिगणे सुगन्धिद्रव्यमेकम्** ( सुसू. ३८.२४ )
**गुणाः- स्वादुतिक्तः कषायः व्रणरोपणः कफपित्तघ्नः रक्तजरोगघ्नः ग्रहघ्नः शीर्षरोगनुत्** ( ध. ३.१३३ )
**कटुतिक्तः योनिदोषजित् रुजानाशनोऽजीर्णघ्न आध्मानजिच्च** ( रा. १२.१९४ )
हिं.—सरलका गोंद, सरलका रस, चन्द्रस, गन्धविरोजा.
**म.—सरळडिंक, चन्द्रुस.**
गु.—चन्द्रस, जनार्जन, गन्धवेरीजो.
बं.—टार्पिनतेल, नवनीतखोटी गन्धविरजा.
ता.—पिनैमारू.
फा.—सन्द्रुस. काइरुवा.
सरळ देवदाराचा डिंक. गुग्गुळी. या नावाची एक वनस्पती आहे. नवनीत नावाचा धूप. गव्हला इत्यादीच्या गणातील, मळातील दोष काढणाऱ्या गणातील, एलादी गणातील, व्रणाला धूप देणाऱ्या वर्गातील, धूम्रपानाला उपयुक्त एक द्रव्य. गुण—गोड, कडु, तुरट, जखम भरून आणणारे, कफपित्त नाशक, रक्तजरोग, डोक्याचे रोग, ग्रहबाधा नाशक. योनिदोष, वेदना, पोटफुगी, अजीर्ण नाशक.
**बिल्वः** ( चक. १.२३; चचि. १२.६६ ) बेल.

**-वेष्टकादिचूर्ण**-न., **वातजौष्ठप्रकोपे प्रतिसारणार्थमुपयोजनीयं श्रीवेष्टकसर्जरससुरदारुगुग्गुलुयष्टिमधुकांना चूर्णम्** ( सुचि. २२.५ )
सरळाचा डिंक इत्यादीचे चूर्ण. वातज ओठाचा प्रकोप या रोगावर चोळण्याला योग्य. सरळाचा डिंक, राळ, देवदार, गुग्गुळ, जेष्टमध इ० चे चूर्ण.

**-सोमदेव**-पु., ऋषि० **रसरत्नसमुच्चयकर्त्रा निर्दिष्टः प्राचीनो रसाचार्यः** ( र. ९.६६ )
प्राचीन रसशास्त्रांतील आचार्य.

**श्रीमत्**-वि., **शोभायुक्तम्** ( चवि. ८.१०४ ) शोभायुक्त.
**ऐश्वर्ययुक्तः** ( सुशा. ४.४० ) ऐश्वर्यवान.
पु., वनस्पति० **तिलकः** ( ध. ५.१५८ ) तिळवा.
**पिप्पलः** ( ध. ५.७९ ) पिंपळ.
**सिन्दूरम्** ( ध. ३.१०१ ) शेंदूर.

**(श्रीमती)**-स्त्री., **वार्षिकी** ( ध. ५. १३६ )
एक सुगंधी वनस्पती.

**(श्रीमत्)-दर्शनलोचन**-वि., **कान्तियुक्तलोचनः शोभनाकारनेत्रः** ( चचि. १८.२७ )
सुशोभित कांतियुक्त डोळा. सुंदर डोळा.

**श्रुघ्नी**–स्त्री., क्षार० **स्वर्जिका, अजगल्लिकारोगे आलेपनार्थमुपयुज्यते** ( सुचि. २०.३ )
सज्जीखार, अजगल्लिका रोगात लेपाकरिता.

**श्रुत**–न., **ज्ञानम्, श्रेयस्करो विवादकगुणो जल्पकगुणो वा** ( चवि. ८.१८ ) **शास्त्रज्ञानम्** ( चसू. २८.३७ )
ज्ञान. शास्त्रज्ञान. वादविवाद किंवा वितंडवाद करण्याला अत्यंत आवश्यक.

**–ग्राहिन्**–वि., **श्रुतं यथातथं तत्कालं गृह्णाति, तत्र नाधिका बुद्धिः प्रभवति इति तादृशः** ( चवि. ८.१०० )
ऐकलेले सर्व समजणारा. पण अधिक बुद्धीचा प्रभाव नसणारा.

**–निगादिन्**–वि., **श्रुतं निगदति तथाश्रुतशब्दपूर्गं वदति इति श्रुतग्रहणशक्तिमान्** ( सुचि. २८.३ )
जसे ऐकले तसेच्या तसे बोलणारा. ऐकलेले सर्व ध्यानात ठेवणारा.

**–शान्ति**–वि., **आकर्णितशान्तिमयमङ्गलपाठः** ( सुचि. २९.१२ )
शांतिमय मंगल पाठ ज्याने ऐकला आहे तो.

**–स्फोटा**–स्त्री., वनस्पति० **कर्णस्फोटा** (रापरि.३.४१)
कानफोडी.

**श्रेणिका**–स्त्री., वनस्पति० **निश्रेणिका** ( रापरि. ८.५० )
पशूंचे बल कमी करणारी जंगलातील वनस्पती.

**श्रेयसी**–स्त्री., वनस्पति० **गुणवती** ( चशा. ८.३ )
हिरडा.
**वनस्पति० रास्ना** ( चसि. ९.८; चचि. २६.९३; ध. १.२७० )
रास्ना.
**पिप्पलीभेदः, हस्तिपिप्पली** ( चचि. १०.२०; ध. २.७८; असंउ. २२ ) **द्र० 'पिप्पली'**
गजपिंपळी. पहा ‘ पिप्पली ’
**अम्बष्ठा** ( रा. ४.१७१ ) मयूरशिखा.
**प्रियङ्गुः** ( रा. १२.२९ ) गव्हला.
**पाठा** ( रा. ६.९८ ) पहाडमूळ.
**हरीतकी** ( रा. ११.३०७ ) हिरडा.
**कफघ्नशाक०** ( चसू. २७.१०७ ) एक कफघ्न भाजी.
वि., **गुणश्रेष्ठः** ( चशा. ८.३ ) गुणांनी श्रेष्ठ. गुणी.

**श्रेष्ठ**–न., भैषज्य० **मौक्तिकम्** ( ध. ६.६२ ) मोती.
खनिज० **वङ्गम्** ( ध. ६.१३ ) कथील.
**रौप्यम्** ( ध. ६.६ ) रुपे.

**( श्रेष्ठा )**–स्त्री., वनस्पति० **पद्मा** ( ध. ४.९०; असंक.२ )
स्थलकमलिनी. एक कमळ.
**त्रिफला** ( असंक. २; र. १ .५९ ) त्रिफळा.

**श्रेष्ठाम्ल**–न., वनस्पति० **वृक्षाम्लम्** ( रा. ६.१४४ )
अमसूल.

**श्रोणि**–स्त्री., शारीर० **कटिः, वातस्य स्थानम्** ( सुसू. २१.६; सुचि. ३.५०; सुशा. ३.८ ) **ऊरुसंधेरधस्तात् स्मरमन्दिरोपरितनभागः; द्वादशाङ्गुलप्रमाणा स्त्रीश्रोणिः तत्प्रमाणं पुरुषोरःसमानम्** ( सुसू. ३५.१२ ) **श्रोण्यां पञ्चास्थीनि सन्ति** ( सुशा. ५.१९ ) **द्र० ‘ कटि ’**
पक्काशय व गुद यांच्या मधला ओटी पोटाच्या आतला मोठ्या आतड्याचा भाग. याला श्रोणि कटी पक्काधान, पुरीषाधान, पुरीषधार, अपानालय, अपानस्थान, वाताशय, वातस्थान, इतकी नावे आहेत. हे वाताचे मुख्य स्थान. वाताच्या चिकित्सेचे, बस्तीचेही मुख्य स्थान. मांड्यांच्या संधीच्या खाली व शुक्राच्या स्थानाच्या वर, स्त्रियांत योनीच्या वरचा भाग. स्त्रियांची कंबर बारा अंगुळे विस्तृत. पुरुषाच्या उरःस्थानाइतके–छाती इतके प्रमाण असते. कंबरेत पाच हाडे असतात.

**–काण्ड**–पु., न., शारीर० **श्रोणिभागः, कटिकतरुणमर्मस्थानमस्य समीपे वर्तते** ( सुशा. ६.२६ )
कंबरेचा भाग. कटिप्रदेश. याच्या जवळच कटिक तरुण मर्मस्थान आहे.

**–ग्रह**–पु., लक्षण० **कटिग्रहः** ( चसि. ९.६ )
कंबर धरणे, जखडणे.

**–प्रदेशप्रतिव्यूढा**–वि., **कटिप्रदेशविशाला** ( शय्या ) ( ड ) **शोभनोन्नता** ( सुचि. ३८.३ )
ज्या खाटेवर कंबरेचा भाग थोडा उन्नत राहील अशी त्या खाटेवरची शय्या.

**–फलक**–न., अस्थि० **द्वे श्रोणिफलके** (चशा. ७.६ )
कंबरेच्या दोन्ही बाजूचा सपाट फळीसारखा हाडांचा भाग, हे दोन आहेत.

**–भेद**–पु., रोग० **श्रोण्योस्तुदनम्, श्रोण्योर्भेदवत् पीडा, अशीतिवातविकारेष्वेकः** ( चसू. २०.११; असंसू. २०.१३ )
कंबरेत टोचणे फुटणे इत्यादी प्रकारची वेदना. ऐशी वातविकारांतील एक.

**-शूल**–पु., लक्षण० **कटिशूलः, वातजशूलस्य लक्षणम्** ( सुचि. ३४.९ )

कंबरेत शूळ, वातज शूलाचे लक्षण.

**श्रोण्याकुट्टन**–( परिव० ) न., **पार्ष्ण्या पादेन वा श्रोण्या आहननम् आघातो वा** ( असंशा. ३ )

कंबर ठोकणे, कंबरेवर पायाने टाचेने तुडवणे, ठोकणे.

**श्रोतृ**–वि., **शब्दं शृणोति इति श्रोता, क्षेत्रज्ञस्यात्मनो नाम** ( सुशा. ३.४ )

श्रोता, ऐकणारा. आत्म्याचे नाव. आत्मा (ऐकणारा.)

**श्रोत्र**–न., ज्ञानेन्द्रिय० **शृणोत्यनेनेति श्रोत्रम्** ( चसू. ८.८ ) **पञ्चबुद्धीन्द्रियेष्वेकम्** ( चशा. ७.७) **श्रवणेन्द्रियम्** ( सुशा. १.४ ) **इदमान्तरिक्षमिन्द्रियम्** ( चशा. ७.१६; अहसू. १२.१; असंसू. ७.२४१ )

ज्याच्याने ऐकतो ते श्रोत्र–कान. पाच बुध्दींद्रियांपैकी एक. ऐकण्याचे इंद्रिय. हे आकाशभूयिष्ठ इंद्रिय आहे. **अतीन्द्रियश्रवणमैश्वर्यकृतं योगिनाम् तच्च तेषाम् अष्टविधेष्वैश्वरबलेष्वेकम्** ( चशा. १.१४० )

कानाच्या शक्तीच्या बाहेरचे ऐकावयास येणे हे योग्याच्या ऐश्वर्याने येते. ते त्यांच्या आठ प्रकारच्या ऐश्वर्याच्या बलांपैकी एक.

**-दौर्बल्य**–न., लक्षण० **श्रोत्रेन्द्रियस्य दौर्बल्यम्** ( चसू. २३.२८ )

कान ह्या इंद्रियाची दुर्बलता.

**-शृङ्गाटक**–न., शारीर० **श्रोत्रविवरान्तर्गतो भागः, तत्र शङ्खावर्तप्रकारकाः संधयः** ( सुशा. ५.२७ ) **कर्णपथः** ( असंउ. १ )

कान या अवयवाच्या पोकळीच्या आतील भाग. त्या भागात शंखाच्या वेटोळ्यांसारखे वाटोळे संधि असतात. कानाचा मार्ग.

**श्रोत्रादिपरीक्षा**–स्त्री., **श्रोत्रादीनि शब्दाद्यर्थग्रहणेन परीक्षेत। श्रवणादिज्ञानेन्द्रियपरीक्षणं शब्दस्पर्शादिविषयग्रहणेन कार्यम्** ( चवि. ४.८ )

कानाची परीक्षा. कान इंद्रियाची परीक्षा. शब्दादी ऐकू येण्याचे सामर्थ्य पाहून परीक्षा करावी. श्रवणादी ज्ञानेंद्रियांचे परीक्षण शब्दस्पर्शादी विषयांच्या ग्रहणशक्तीने करावे.

**श्रोत्रिय**–पु., **वेदविद्ब्राह्मणः** ( सुचि. ३४.१० )

वेद जाणणारा ब्राह्मण.

**श्रोत्रेन्द्रियविज्ञेय**–वि., **श्रोत्रेन्द्रियेण ज्ञातुं शक्यम्** ( **लक्षणं रोगो वा** )। **यथा रोगपरीक्षायामाध्मानादिरोगेषूपलभ्यमानो गुडगुडादिशब्दः** ( सुसू. १०.५ )

कान ह्या इंद्रियाने समजण्यासारखे. (लक्षण किंवा रोग.) जसे पोटफुगीतला गुडगुड शब्द कानाने ऐकूनच ज्ञात होतो.

**श्र्याह्व**–पु., वनस्पति० **श्रीवेष्टकः** (चसू.३.३;असंसू.१५)

सरळ देवदाराचा डिंक.

**बिल्वः** ( असंउ. १० ) बेल.

**श्लक्ष्ण**–वि., **खरविपरीतः** ( अहसू. १९.७२ )

पु., गुण० **विंशतिगुणेष्वेकः** ( अहसू. १.१८ ) **मसृणम्** ( सुचि. २४.१३ ) **अपरुषम्** ( र. ३०.१-२ ) **अकर्कशः** ( सुसू. ११.१६ ) **तत्कर्म–रोपणे शक्तिः** ( अहसू. १.१८ ) **पिच्छिलगुणवत् श्लक्ष्णो जीवनः श्लेष्मलः संधानकृद्बल्यो गुरुश्च** ( सुसू. ४६.५२१ )

गुळगुळीत. वीस गुणांपैकी एक. खडबडीत, किंवा खरखरीत नसलेले, खरविपरीतकर्म–व्रणाचे रोपण करणे. पिच्छिल गुणासारखे. श्लक्ष्ण जीवनोपयोगी व्रण भरून आणणारा, जड, बलकर, कफवर्धक.

**चिक्कणः, स्नेहं विनाऽपि स्यात्कठिनोऽपि हि चिक्कणम् यथा शरीरधातुगुणेष्वेकः** ( चशा. ६.१० )

चिक्कण. स्नेहावाचून कठिण असूनही अति समपृष्ठ भाग असलेले स्पर्शी द्रव्य.

न., वि., **अतिकोमलम् यथोत्तरबस्तियन्त्रस्य प्रवेशाऽग्रम्** ( अहसू. १९.७२ )

अतिशय कोमल. जसे उत्तरबस्तीच्या यंत्राचे प्रवेशनळीचे टोक.

वनस्पति० **अश्मन्तकः** ( ध. १.१९४ ) आपटा.

न., वनस्पति० **कतकम्** ( ध. ३.१७२ ) निवळी.

**( श्लक्ष्णा )**–स्त्री., वि., **स्पर्शसुखा तद्विपरीता कर्कशा यथा पेशी** ( सुशा. ५.४० )

गुळगुळीत. स्पर्शाला सुखकारक. या उलट स्पर्शाची कर्कश. जसे पेशी.

**-गण्डत्व**–न., लक्षण० **मसृणकपोलत्वम्** ( चचि. १३.२१ )

चिक्कण, गुळगुळीत गाल असणे.

**-ता**–(परिव०) स्त्री., **मृदुत्वम्** ( चनि. ५.७ )

गुळगुळीतपणा.

**-पेषित**–वि., **सूक्ष्ममर्दितम्** ( सुचि. ३८.३४ )

सूक्ष्म खललेले.

**–मुख**–वि., यन्त्रलक्षण० श्लक्ष्णगुणयुक्तमुखोपेतम् ( सुसू. ७.९ )
गुळगुळीत तोंडाचे यंत्र.

**–शिला**–स्त्री., श्लक्ष्णशिलिका, नापितशिलिका, माषयूषोपमेयं, शस्त्रनिशानार्थम् उपयुज्यते (सुसू.८.१३)
गुळगुळीत, चिक्कण, शिळा—( न्हाव्याची )—वस्तरा लावण्याची; उडदाच्या कढणाच्या रंगाची शिळा.

**श्लक्ष्णाङ्ग**–वि., लक्षण० श्लक्ष्णमङ्गं यस्य सः ( श्लेष्मलनरः ) (चवि. ८.९६)
गुळगुळीत अंगाचा, कफदोषात्मक मनुष्य.

**श्लथ**–वि., शिथिलम् ( असंशा. ८.२४ ) शिथिल, ढिले.

**–संधिता**–स्त्री., लक्षण० संधिशैथिल्यम्, स्त्रस्तसन्धित्वम् ( अहृसू. ११.१६ )
ढिले सांधे असणे, सांधे गळणे.

**श्लथाङ्गत्व**–न., लक्षण० अवयवशैथिल्यम् ( अहृसू. ११.८ )
अवयव ढिले असणे.

**श्लाघनीय**–वि., प्रशंसाऽर्हः, प्रियः ( असंसू. ८.५ )
प्रशंसा करण्यासारखे, स्तुत्य.

**श्लिष्टवर्त्मन्**–न., नेत्ररोग० लक्षणम् अस्मिन् वर्त्मनी कण्डूश्वयथुरागिणी श्लिष्टे च भवतः (असंउ. ११ )
पापणीचा रोग. यात पापणीला सूज खाज व लाली असते. पापण्या चिकटतात.

**श्लीपद**–न., रोग० ( चसू. २७.२१२ ) पादाद्युपरि शोथात्मकोऽयं रोगः ( चचि. १२.९८ ) 'हस्तिपाद' इति लोके। केचिच्छिलावत्पदं श्लीपदमिति वदन्ति ( मधुकोष मानि. ) अयं हस्तिपादसदृशो विशेषतः पादस्य भवति। अस्मिन्रोगे शोथेन पादः स्थूलः, कफसम्बन्धेन कठिनश्च जायते। तस्य स्थानं रोहिणी नाम षष्ठी त्वक् ( सुशा. ४.४ ) हेतुः–पुराणोदकभूयिष्ठे देशे सर्वर्तुषु शीतले च देशे अयं रोगः प्रादुर्भवति ( सुनि. १२.१४ ) यत्र स्थिरप्रवाहा नद्यस्तत्र देशे कृमिश्लीपदकण्ठरोगाः भवन्ति ( अहृसू. ५.१०; असंसू. ६) महेन्द्रप्रभवनदीजन्यः (सुसू.४५.२१) संप्राप्तिः–अनूपदेशे कफोल्बणा दोषा वङ्क्षणोर्वादिमधःकायं प्रस्थिता मांसासृग्गा सन्तः कालेन पादौ चाश्रित्य शनैर्घनं शोफं कुर्वते (सुनि. १२.१०; असंउ. ३४ ) कफोत्तरा रक्तचलाश्रिता मला घनं शोफं कुर्वन्ति ( र. २५.५६ ) पादवद्धस्तकर्णाक्षिनासिकौष्ठेष्वपि श्लीपदं जायते इति केषांचिदाचार्याणां मतम् ( सुनि. १२.१५; असंउ. ३४ ) संख्यासम्प्राप्तिः–तत्त्रिविधं वातजं पित्तजं श्लेष्मजं च ( सुनि. १२.१०; असंउ.३४ ) सामान्यलक्षणम्–अस्मिन्रोगे कफस्य प्राधान्यादवयवस्य गुरुत्वं महत्त्वं चास्ति ( सुनि. १२.१३ ) लक्षणम्–वातजे–खरं कृष्णं परुषमनिमित्तानिलरुजं बहुशः परिस्फुटति च ( सुनि. १२.११; असंउ. ३४ ) पित्तजे–पीतावभासमीषन्मृदु ज्वरदाहप्रायं च भवति ( सुनि. १२.११; असंउ. ३४ ) कफजे–श्वेतं स्निग्धावभासं मन्दवेदनं भारिकं महाग्रन्थिकं कण्टकैरुपचितं च भवति ( सुनि. १२.११ ) गुरु बृहन्मांसाङ्कुरैश्चितमरुक्च भवति ( असंउ. ३४ ) साध्यासाध्यत्वम्-यत्संवत्सरातीतं महद्वल्मीकवज्जातं प्रस्रुतं तद्वर्जनीयम् ( सुनि. १२.१२ ) सपरिस्रुतं चासाध्यम् ( असंउ. ३४ ) सर्वलिङ्गं कण्डुरं कफप्रकृतिकस्य श्लेष्मयुतं वर्जनीयम् (मानि.) चिकित्सा–वाम्योऽयं रोगः (अहृसू. १८.२; असंसू. २७) अनुवासनानर्हः ( अहृसू. १९.९ ) श्लीपदानां निवृत्तये सर्षपतैलं पिबेत् ( सुचि. १९.६० ) अत्र आर्द्रकमुपयुक्तम् ( अहृसू. ६.१६५ ) द्रवन्त्यादिक्षारा उपयुक्ताः ( सुचि. १९.६८-६९ ) क्षिप्रमर्मण उपरि चतुरङ्गुलेऽङ्गुष्ठे सिरां विध्येत् ( सुचि. १९.५६-६२) कठिणसुप्तमांसेऽग्निकर्मचिकित्सा कार्या ( सुसू. १२.१० ) वातिके गोमूत्रयुक्तमेरण्डतैलपानमग्निदाहं सिराव्यधं च कुर्यात् (सुचि.१९.५२-५४) पैत्तिके पित्तार्बुदविसर्पवत्क्रियां कुर्यात् ( सुचि. १९.५५ )

पाय इत्यादींवर सूज असलेला रोग. शिळेप्रमाणे–दगडाप्रमाणे पाय म्हणून श्लीपद म्हणतात. **हत्तीपाय**. हे दुसरे नांव. यात हत्तीच्या पायाप्रमाणे पाय होतो, म्हणून हत्तीपाय. सुजेने स्थूल मोठा व कफाने कठीण होतो. स्थान—रोहिणी नावाच्या सहाव्या त्वचेत हा होतो. कारण— जुने पाणी साचून राहणाऱ्या व सर्व ऋतूत थंड अशा प्रदेशात हा रोग होतो. स्थिरप्रवाह असलेल्या नद्यांच्या प्रदेशात हा रोग व कृमि, कंठरोगही होतो. महेंद्रातील नदीच्या पाण्यामुळेही होतो. महेंद्र— महेंद्रमाल, जगन्नाथ ते कृष्णानदीपर्यंतचा प्रदेश ) संप्राप्ति—झाडे, पाणी विपुल असलेल्या देशात कफोल्बण दोष जांघेत किंवा खालच्या शाखेत पायात मांस व रक्तात दुष्टि

करून यात हळू हळू घट्ट अशी सूज करतात. पाय, हात, कान, डोळे, नाक, ओठ यांवरही हा रोग होतो. प्रकार ३—वातज, पित्तज, कफज.

**सामान्य लक्षणे—** या रोगात कफाचे प्राधान्य असल्यामुळे जडत्व व जाडपणा असतो. या चिन्हात **वातज प्रकारात** खरखरित, काळे, शुष्क व कारणाशिवाय वेदना व चिरण्या पडतात. **पित्तज–** पिवळट, किंचित मऊ व ज्वर आणि दाहयुक्त. **कफज–** पांढरे, तुळतुळीत मंदवेदनायुक्त, जड, मोठमोठ्या गाठीयुक्त व काटे असलेले, पीडारहित असते. साध्यासाध्यत्व– जो एक वर्षापेक्षा जुना, अति मोठा, वारुळासारखा झालेला व पसरतो तो व स्राव होणारा, सर्व दोषलक्षणयुक्त, कफप्रकृति असलेल्या मनुष्याला कफदोषयुक्त व खाजवणारा व सर्व चिन्हांनी युक्त असा हा रोग वर्ज्य.

**उपचार–** वांती करवावी मोहरीचे तेल प्यावे. आले, उंदिरकानी, क्षार उपयुक्त. क्षिप्र मर्माच्या वर चार अंगुळावर आंगठ्यावर शीर तोडून रक्तस्राव करावा. कठीण व स्पर्शनाश झालेल्यात डाग द्यावा. **वातिकात** गोमूत्रयुक्त एरंडतेल, रक्तस्राव व डाग द्यावा. **पित्ताच्या विकारात–** पित्तार्बुद विसर्पाप्रमाणे उपचार करावे. अनुवासन स्नेहबस्ति मात्र येथे देऊ नये.

**–घ्न–**पु., **सिद्धयोग० श्लीपदनाशकः** (र. २५.५७-५९)
एक योग. हत्तीपायरोगनाशक.

**–निदान–**न., **श्लीपदरोगस्य निदानम्** (सुनि. १२.१)
हत्तीपाय या रोगाचे निदान.

**श्लेषक–**पु., **शारीर० कफभेदः । पर्वास्थिसन्धिषु श्लेषणात् श्लेषाच्छेषकः** (असंसू. २०; अहृसू. १२.१८)
कफाचा एक प्रकार. पेरी, हाडे, संधि यांना चिकटून ठेवण्याच्या स्वभावाने याला श्लेषक म्हणतात.

**श्लेष्मन्–**पु., **दोष० कफः अम्भःपृथिवीभ्यां श्लेष्मा उत्पद्यते** (चवि. १.५; असंसू. २०; चवि. ८.१२२) **'श्लिष आलिङ्गने ।' इत्यस्मात्कृद्विहितेन प्रत्ययेन श्लेष्मा इति । एतेन श्लेष्मणः सन्ध्यादियोजनं दर्शितम्** (सुसू. २१.५) **अव्यापन्नः सञ्छरीरधारको व्यापन्नः सन्विनाशकारणः** (सुसू. २१.३) **द्र० 'कफ'**
कफ. एकमेकांना चिकटवून ठेवणारा 'श्लिष् आलिङ्गने' धातूपासून झालेला शब्द. म्हणून श्लेष्मा–कफ. संधीमध्ये कफ या हेतूनेच असतो. विकृत नसलेला कफ शरिराचे धारण करतो व विकृतकफ शरिराचा नाश करतो.

**दोष० दोषाः पुनस्त्रयो वातपित्तश्लेष्माणः** (चवि. १.५) **तस्य साम्यादरोगता स्वास्थ्यमिति** (अहृसू. १.२०) **दूषणस्वभावाद्दोषा इति** (असंसू. २०) **कफदोषः** (र. ३.७७; चवि. १.५)
एक दोष. दोष तीन. वातपित्तकफ. त्यांच्या समप्रमाणाने आरोग्य राहाते. दूषित करण्याच्या स्वभावामुळे यांना दोष म्हणतात.

**मल० कफमलस्वरूपः मलिनीकरणादाहारमलत्वान्मलः** (असंसू. २०)
मळ. कफमळ. शरिराला मलीन करतो म्हणून मळ म्हणतात. शरिरातून बाहेर फेकून देण्याइतके जास्त होतात तेव्हा दोषांना म्हणतात.

**(श्लेष्म)–जक्रिमि–**पु., **रोग० कफजक्रिमिः** (चवि. ७.९) **द्र० 'क्रमि'**
कफज क्रिमि. एक रोग. पहा 'क्रमि'.

**–धरा–**स्त्री., **कला० श्लेष्मधारिणी,** (भाप्र.) **धातुक्रमसम्भवविशेषाच्चतुर्थी कला, तत्स्थेन हि श्लेष्मणाऽऽश्लेषिताः सर्वसंधयो दृढा भवन्ति, सोपाङ्ग इवाक्षाः** (असंशा. ५.३८; सुशा. ४.१४) **तस्याः कर्मसंधयः साधु वर्तन्ते श्लेष्मणा संश्लिष्टाः सन्तः** (सुशा. ४.१५)
कफधरा. एक कला. कफ निर्माण व धारण करणारी चवथी कला. तिने निर्माण केलेल्या कफाने संधीचे दोन्ही अस्थि घटक एकमेकांना आलिंगून (जोडलेले राहून) बळकट होतात. तिचे कर्म– कफाने जोडलेले संधि चांगले रहातात आपापली कर्मे चांगली करतात.

**–धातु–**पु., **शारीर० शरीरधारकः कफः** (चवि. ८.१२२)
शरिराचे धारण करणारा धातुरूप कफ. कफधातु.

**–पिच्छा–**स्त्री., **श्लेष्मरूपा पिच्छा । श्लेष्मसंयुक्ता पिच्छा । पिच्छा नाम अंत्रस्थं पिच्छिलं द्रव्यम्** (चचि. १४.१३६) **द्र० 'पिच्छा'**
कफरूपी पिच्छा, कफयुक्त बुळबुळीत द्रव्य. पिच्छा म्हणजे आंत्रातील बुळबुळीत द्रव्य.

**–पित्त**–न., **श्लेष्मसंसृष्टं पित्तम् कफपित्तम्** ( चसू. ५.४० )
कफ आणि पित्त. कफमिश्रित पित्त.

**–प्रकृति**–वि., **दोषप्रकृति० कफप्रकृतिः ( नरः )** ( सुशा. ४.७२ )
कफप्रकृति. एक दोष प्रकृति. कफस्वभावी प्रकृति.

**–प्रसेक**–पु., **लक्षण० कफप्रसेकः, मुखे लालास्रावादिः** ( चसू. ५.३० )
कफाचा स्राव. तोंडातून होणारा लाळ, कफ यांचा स्राव. तोंडाला पाणी येणे.

**–भू**–पु., **षट्पञ्चाशत्प्रत्यङ्गेष्वेकम् । कण्ठस्य पार्श्वयोर्व्यवस्थितो भागः । द्वौ श्लेष्मभुवौ** (चशा.७.११)
छप्पन्न प्रत्यंगांतील एक. घशाच्या दोन्ही बाजूला असलेला भाग.

**–मूल**–न., **कफमूलम्** ( चसू. २०.१९ )
कफाचे मूळ.

**–रुद्धबिल**–वि., **कफरुद्धद्वारः (बस्तिः)**(चसि.९.४).
कफाने चोंदलेले द्वार असलेला. (बस्ति).

**–विकार**–पु., **कफरोगः । कफविकारास्तु तृप्तितन्द्रादिकाः विंशतिः**, द्र० **' कफ '** ( असंसू. २० )
कफरोग. कफविकार-तृप्ति, तंद्रा इत्यादी वीस होत.

**–विदग्धदृष्टि**–पु., **नेत्ररोग० अयं दृष्ट्याश्रयः । तत्र लक्षणम्– यदाल्पकफदोषस्त्रिषु पटलेषु स्थितस्तदा रूपाणि शुक्लानि पश्यति । दिवा सूर्यानुगृहीतचक्षुरीक्षेत । रात्रौ नक्तान्ध्यमापद्यते** (सुउ. ७.३७-३८)
कफाने विदग्ध झालेली दृष्टि. हा दृष्टीचा रोग. लक्षण– जेव्हा अल्प प्रमाणात कफ दोष तिन्ही पटलात असतो तेव्हा दृश्य पांढरे दिसते. दिवसा सूर्याच्या कृपेने ( उजेडाने ) दिसते. व रात्री आंधळेपणा येतो.

**–शमन**–वि., **कफशामकम्** ( असंसू. १४ )
कफशामक, कफनाशक.

**–संभवरोग**–पु., **कफजरोगः** ( सुशा. ७.१३ )
कफापासून झालेला रोग, कफजरोग.

**–संशमनवर्ग**–पु., **कफशमनद्रव्यसंग्रहः कालेयकागुरुतिलपर्णीकुष्ठहरिद्राशीतशिवशतपुष्पासरलरास्नाप्रकीर्योदकीर्येङ्गुदीसुमनाकाकादनीलाङ्गलीहस्तिकर्णमुञ्जातकलामज्जकप्रभृतीनि वल्लीककण्टपञ्चमूल्यौ पिप्पल्यादिः बृहत्यादिः मुष्ककादिर्वचादिः सुरसादिरारग्वधादिरिति श्लेष्मसंशमनवर्गाः** ( सुसू. ३९.९ )
कफशामक द्रव्यांचा गण. चंदन, अगरू, हुलहुल, कोष्ठ, हळद, कापूर, बडिशेप, सरळ देवदार, रास्ना, लहान करंज, घाणेरा करंज, हिंगणबेट, जाई, जटामांसी, कळलावी, भुईपळस, लाल सुरण, काळा वाळा इत्यादी. वल्लीकंटक मोठी पाच मुळे. पिंपळी इत्यादी रिंगणी इत्यादी मोखा इत्यादी वेखंड इत्यादी तुळस इत्यादी बहावा इत्यादी कफशामक वर्ग होत.

**–स्थान**–न., **कफस्थानम्** ( असंसू. २० )
कफाचे स्थान.

**श्लेष्मल**–वि., **कफप्रकृतिकः** ( चसू. ७.३९ ) **श्लेष्मदोषाधिकः जन्मत एव । "श्लेष्मलस्य श्लेष्मनिमित्ता व्याधयः प्रायेण बलवन्तश्च भवन्ति"** ( चवि. ६.१८ ) **श्लेष्मभूयिष्ठः** ( चवि. ८.९६ )
कफप्रकृतीचा. शरिरात जन्मतः कफदोषाचे आधिक्य असलेला. याला कफाचे रोग बहुधा अधिक होतात व ते बलवान असतात. कफाधिक. **कफकरम् यथा पयःप्रभृति माषतिलादि वा** ( अहसू. ५.२१; अहसू. २७.२ )
कफकर. कफवर्धक. दूध, उडीद, तीळ इत्यादी.

**श्लेष्माघात**–पु., **रोग० श्लेष्मजं मूत्रकृच्छ्रम् तल्लक्षणम्– स्निग्धं शुक्लमनुष्णं च मेहति मुष्कमेहनबस्तीनां गुरुत्वं संहृष्टरोमत्वं च भवति** ( सुउ. ५९.६ )
कफाने होणारा लघ्वीला त्रास. लक्षण– स्निग्ध, पांढरी थोडी उष्ण लघ्वी होते. वृषण, लिंग, बस्ती जड होतात व लघ्वी करताना रोमांच उभे राहतात.

**श्लेष्मात**–पु., **वनस्पति० श्लेष्मातकः** ( र. ११.९४ )
भोकर.

**श्लेष्मातक**–पु., **वनस्पति० महाकषायवर्गे विषघ्नगणे प्रोक्तम् एकं द्रव्यम्** ( सुचि. ३१.५ )
**शेलुः** ( अहसू. ६.१२०; असंउ. ४४ )
**बहुवारः** ( चसू. ४.११ (१६ )
**फलमस्य लेपतः स्तन्यशुद्ध्यर्थमुपयुज्यते** ( चचि. ३०.२७५; सुचि. ५.१० असंसू. १५ )
**गुणाः–स्वादुः कटुः कषायः शीतः ( गुरुः, फलं गुरु )** (चसू. २७.१५९) **क्रिमिशूलामरक्तदोषव्रणविस्फोटहरः** ( ध. ५.९४ ) **फलगुणाः–गुरुकफकृत्** ( सुसू. ४६.१९३ )

हिं.—बरालसोडा.

**म—भोंकर, भोकरी, शेळवंट, शेळवण, गोंधणी.**

गु.—गुदन, गुन्दो मोटो, गुन्दी नानी.

बं.—बहुयार, बहुवार, चालता गाछ, बोहरी.

ता.—विडी, नरुविल्ली.

फा.—सिपिस्तान.

भोकर. विषघ्न. गुण– गोड, तिखट, तुरट, थंड, क्रिमि – शूल – आम – रक्तदोष – व्रण – फोड नाहीसे करणारे. फळ— जड, कफकर, अंगावरचे दूध शुद्ध करण्यास याच्या फळाचा लेप देतात.

**( श्लेष्मातकी )**–स्त्री., **वनस्पति० श्लेष्मातकः** ( सुक. ५.७५-७६ ) भोकर.

**श्लेष्मातक्याद्यगदः अगद० दर्वीकरविषहरः राजिलविषहरश्च** ( सुक. ५.७५-७६ )

भोकर इत्यादिकांचा विषहर योग. नागाचे व राजिल सर्पाचे विषनाशक.

**–तैल**–न., **गुणाः– गुरु शीतलं श्लेष्मलं वातपित्तहरम्** ( असंसू. ६ ) **केश्यम्** ( ध. ६.१४२ )

भोकराचे तेल. गुण–जड, थंड, वातपित्तहर, केसांना हितकर व कफवर्धक.

**–त्वच्**–स्त्री., **पानाभ्यञ्जनादिभिर्लूताविषे उपयुज्यते** ( सुक. ८.१२० )

भोकराची साल, अंगाला चोळणे, पिणे इत्यादी उपयोगाने विषारी किड्यांच्या विषावर उपयुक्त.

**–प्रसव**–न., **बहुवारपुष्पम् श्लेष्मातकपुष्पम्** ( सुउ. ४७.३२ ) भोकराचे फूल.

**श्लेष्माधिक**–वि., **कफदोषाधिकः (नरः)** (चसू.१३.१९)

कफदोष अधिक असलेला.

**श्लेष्माधिष्ठान**–वि., **यद् श्लेष्माणमुपादाय भवति श्लेष्माश्रया** ( सुनि. ३.३ )

कफ हे ज्याचे उपादान कारण आहे, कफ हा ज्याचा प्रधान घटक कारण आहे तो मूतखडा.

**श्लेष्माभिष्यन्द**–पु., **नेत्ररोग० कफजोऽभिष्यन्दः** ( सुउ. ११.१ )

कफाने आलेला डोळा (रोग.)

**श्लेष्माभिष्यन्दप्रतिषेध**–पु., **अध्यायसंज्ञा०** ( सुउ. ११.१ )

अध्यायाचे नाव. यात कफाने आलेल्या डोळ्यावरचे उपचार दिले आहेत.

**श्लेष्माशय**–पु., **कफाशयः । उरःस्थानम्** ( सुशा. ५.८ )

कफाचा आशय, उरःस्थान, छाती.

**श्लेष्मास्राव**–पु., **नेत्ररोग० नेत्रसंधिगतः रोग०, अश्रुस्रावाख्यः, तत्र लक्षणम्, श्वेतसान्द्रपिच्छिलनीरुज श्लेष्मस्रावयुक्तः रोगोऽयमसाध्यः** ( सुउ. २.६ )

कफाचा स्राव. डोळ्याचा रोग. डोळ्याच्या सांध्याचा रोग. नाव—अश्रुस्राव. लक्षण–पांढरा, दाट, बुळबुळीत, वेदना रहित, कफाच्या स्रावाने युक्त रोग. हा असाध्य.

**श्लेष्मोत्क्लेश**–पु., **लक्षण० कफोत्क्लेशः** ( अहसू. १८.३८ )

कफाचा उत्क्लेश. कफ घशात तोंडात उचंबळून येणे. कफाचा सारखा अधिक स्राव होणे.

**श्लेष्मोत्तर**–वि., **श्लेष्माधिकः ( नरः )** ( चसि. १.९ )

कफ आधिक असलेला.

**श्लेष्मोद्गिरण**–न., **लक्षण० कफस्य स्रावः । विंशतिश्लेष्मविकारेष्वेकः** ( चसू. २०.१७; असंसू. २० )

कफ बाहेर पडणे. आमाशयातून कफाची वांती होणे, कफाचा स्राव. कफज वीस विकारांपैकी एक.

**श्लेष्मोत्सेक**–पु., **लक्षण० कफोत्सेकः । कफवृद्धिः** ( सुउ. ३९.१९४ )

कफाची वाढ, कफाचे आधिक्य.

**श्लेष्मोपनाह**–पु., **नेत्ररोग० नेत्रसंधिगतः कफजो रोगः साध्योऽयम्** ( सुउ. १.३५ ) **अयं भेद्यो लेख्यश्च** ( सुउ. १४.९-१० )

कफज डोळ्याच्या सांध्याचा एक रोग. हा साध्य आहे. हा खरडून दोष काढण्यासारखा व फोडण्याचा विकार आहे.

**श्लैष्मिक**–वि., **कफविकारयुक्तः (नरः)** ( चसू. १४.२७ )

कफविकार झालेला ( रोगी ).

**कफप्रकृतिकः ( पुरुषः )** ( सुक. ५.३९ )

कफप्रकृतीचा ( पुरुष ).

**श्लैष्मिकौजस्**–न., **ओजो० ओजो यदष्टबिन्दुकं तद्व्यतिरिक्तमोजः श्लैष्मिकौजस्तद्विशुद्धश्लेष्मसमगुणम् । तस्य प्रमाणमर्धाञ्जलिः** ( चशा. ७.१५ )

कफजातीय ओज. ओजाचा एक प्रकार. आठबिंदु-प्रमाण. अशा ओजाच्या शिवाय असलेले. अर्धी ओंजळ प्रमाणा इतके असलेले. विशुद्ध कफाच्या गुणांसारख्या गुणांचे दुसरे. विशुद्धतर ओज.

**श्लोकस्थान**–न., **सूत्रस्थानम्** ( चवि. ८.२९; चसू. ३०.३३ ) **' श्लोकार्थः संग्रहार्थश्च श्लोकस्थानम् । '** ( चसू. ३०.४५-४६ )

सूत्रस्थान. श्लोकांचा आणि त्यांच्या भावार्थाचा संग्रह ज्यात केला जातो ते.

**श्वन्**–पु., **प्राणि० कुक्कुरः** ( सुचि. २४.७६ ) **वातप्रकृतिः प्राणी** ( सुशा. ४.६७ ) **दन्तनखविषः** (सुक. ३.५) **उन्मत्तः सन्दंशेन विषबाधां करोति । उन्मत्तश्वलक्षणम्–शिरोऽभितापी लालास्रावी अधोवक्त्रश्च** ( चचि. २३.१७५ ) **प्रस्रस्तलाङ्गूलोऽत्यर्थं-बधिरान्धः सोऽन्योन्यं अभिधावति** ( सुक. ७.४३-४६ ) द्र० ' **अलर्कविष** '
कुत्रा. वातप्रकृतीचा प्राणी. दातात व नखात विष असलेला. पिसाळलेला कुत्रा चावल्यास विषबाधा होते. पिसाळल्याचे लक्षण— डोके भ्रमिष्ट असते. लाळ गळते. खाली मान करून चालतो. शेपूट गळाल्यासारखे असते, अतिशय बहिरा व आंधळा असतो व इकडे तिकडे धावत असतो.

**(श्व)–ग्रह**–पु., **बालग्रहरोग० लक्षणम्–स पुरुषदेहधारिग्रहः । तेन प्रवेशितेन कम्पहृषितरोमत्व–स्वेद–चक्षुर्निमीलन–बहिरायामनं–जिह्वादंशान्तःकण्ठ-कूजन–धावन–विड्गन्धत्व–क्रोशनादीनि लक्षणानि भवन्ति** ( असंउ. ३ )
एक बालग्रह. हा पुरुषाचा देह धारण करणारा ग्रह आहे. त्याने पछाडलेला बालक कापतो, रोमांच उभे रहातात, घाम, डोळे लाल झालेले, बाहेरच्या बाजूला अंग वाकडे होते, जीभ चावतो, आतल्या आत घशात आवाज करतो, रडतो, ओरडतो, धावतो, अंगाला विष्ठेसारखी घाण येते.

**–दंश**–पु., **रोग० अलर्क विषरोग०** (सुक. ७.४३-४६)
कुत्र्याचा दंश. कुत्रा चावणे. कुत्र्याच्या विषाची बाधा. एक रोग.

**–दंष्ट्र**–पु., **मृग० जाङ्गलो मृगः** ( चसू. २७.४५ ) **चतुर्दंष्ट्रो जङ्गालवर्गीयोऽतिदुष्टः कर्कटक इति कार्तिकपुरे प्रसिद्धः** ( ड. सुसू. ४६.५४ ) **अस्य मांसरसो हिक्कायां प्रशस्तः** ( सुउ. ५०.२९ )
चित्ता. चार दाढांचा पुष्ट बलवान मांड्यांचा अतिदुष्ट वृत्तीचा हिंस्र प्राणी. याचा मांसरस उचकीवर प्रशस्त.

**–( दंष्ट्रा )**–स्त्री., **वनस्पति० गोक्षुरः** (चसू. २३.१२; ध. १.१०३; चसू. ४.१३; सुचि. २.४८ )
गोखरू.
**वनस्पति० कण्डूकरी** ( असंउ. ४६ ) खाजकुहिली.
**मृग० श्वदंष्ट्रः** ( सुसू. २०.५ ) गोखरू.

**–दंष्ट्रादिघृत**–न., **सिद्धघृत० क्षतक्षीणे उपयुक्तम्** ( चचि. ११.४४-४७ )
गोखरू इत्यादीयुक्त तयार घृत. उरःक्षताने क्षीण झालेल्याला उपयुक्त.

**–दंष्ट्रावसुकासव**–पु., **आसुत० पिप्पल्यादीनामनु-पानार्थमुपयुक्तः** ( सुसू. ४६.४३३ )
गोखरू, रुई यांचे आसव. पिंपळी इत्यादी द्रव्ये आहारात आल्यावर अनुपान म्हणून उपयुक्त.

**–दन्त**–पु., **कुक्कुरदन्तः, कुष्ठप्रशमनयोगे उपयुक्तः** ( चचि. ७.१६० )
कुत्र्याचा दात, कुष्ठशामक योगात उपयुक्त.

**–पच**–पु., **चाण्डालः** ( असंसू. ३८ ) चांडाळ.

**–पाक**–पु., **चाण्डालः, लुब्धकः** ( असंशा. १२ )
चांडाळ. पारधी.

**–पित्त**–न., **जाङ्गमद्रव्य० शुनः पित्तम् । तदिदं अपस्मारेऽञ्जनार्थं प्रयुक्तम्** ( चचि. १०.५०; असंसू. ८ )
कुत्र्याचे पित्त. अपस्मारात अंजनाकरिता उपयुक्त.

**–पुच्छा**–स्त्री., **वनस्पति० पृश्निपर्णी** (रा. ४.११८)
पिठवण.

**श्वभ्र**–न., **गर्तम्** ( चशा. ८.२१ )
**गर्तः** ( सुचि. २४.८९; असंशा. २.६० )
खाच, खळगा.
**गुहा** ( चक. १.९ ) गुहा.
**बिलम्** ( सुसू. ३६.३ ) बीळ.

**–प्रपात**–पु., **गर्ते पतनम्** ( असंशा. २ )
खाचेत पडणे.

**श्वयथु**–पु., **रोग० उत्सेधलक्षणः शोफः** ( चसू. १.११०; काखिल. १७.१४-१६; सुचि. २३.४ ) द्र० ' **शोथः** '
दोषांनी वर उचलून आलेला त्वचा मांस इत्यादिकांचा भाग. सूज.

**–कर**–वि., **शोथकरः शोफजनकः** ( सुसू. ४०.५ )
सूज करणारा.

**–पूर्वक**–वि., **शोथपूर्वकः शोफपुरस्सरः** ( अहसू. २९.१; असंसू. ३८ )
पूर्वी सूज असलेला. प्रथम सूज असलेला.

**–हरगण**–पु., **गण० शोथहरः । दशमूलानि श्वयथु-शोथ–हराणि** ( चसू. ४.१६ )
सूज नाहीशी करणारा गण. दशमुळे सूजनाशक आहेत.

**श्वयथुक**-पु., शोथः ( र. २.११० ) सूज.

**श्वस्**-अव्यय० परस्मिन्नहनि ( चक. १.१४ ) अपरेद्युः ( सुचि. ३३.५ )

उद्या, दुसऱ्या दिवशी.

**( श्वो- )-वम्य**-वि., अपरेद्युर्वमनार्हः (अहृसू. १८.१२)

उद्या वमन देण्यास योग्य.

**श्वसन**-पु., वायुः ( सुउ. ६.२४ ) वायु. वात.

वनस्पति० मदनम् ( चक. १.२७ ) गेळफळ.

न., निःश्वसनम् ( सुनि. १६.६१ ) श्वास सोडणे.

श्वासाधिक्यम् ( चचि. ३.४१ )

श्वासाधिक्य. श्वास लागणे.

**( श्वसना )**-स्त्री., शारीर० श्वासवहा नाडी ( चक्र. चचि. १२.७६ )

श्वास वहन करणारी नाडी.

**-कृच्छ्र**-न., लक्षण० दुःखेन श्वासविमोक्षणम् ( सुनि. ११.२८ )

दुःखाने श्वास सोडणे.

**( श्वा ) विद्रोमन्**-न., शल्लकस्य केशाः, शल्लकस्य रोम्णामन्तर्धूमदग्धं भस्म हिक्काशमाय क्षौद्रोपेतं लेहयेत् ( सुउ. ५०.२० )

साळईचे केस. हे बंद मडक्यात ( संपुटात ) जाळून ते भस्म उचकी थांबण्याकरिता मधाबरोबर चाटावे.

**श्वाविध्**-पु., प्राणि० बिलेशयः शल्लकपर्यायः (चचि. १७.११२; सुसू. ४६.७७; चसू. २७.३८) सूचिसदृशरोमयुक्तः । 'साळई' 'साळू' इति लोके ( सुसू. ४६.७७; चचि. १८.१७०; सुउ. ५१.३३; अहृसू. ६.४७; असंसू. ७ ) अस्य मांसं वातानुबन्धजे श्वासे उपयुक्तम् ( चचि. १७.११२ )

साळई, साळू. बिळात रहाणारा प्राणी. मोठी सुई, दाभण यांच्यासारखे केस असणारा प्राणी. याचे मांस वाताचा अनुबंध असलेल्या श्वासास उपयुक्त.

**श्वास**-पु., कर्म० श्वसनम् । प्राणवायोर्गतागतम् ( सुउ. ५५.५ )

एक शारीर कर्म. श्वास घेणे व सोडणे. प्राणवायूचे शरिरात ( फुप्फुसात ) येणे व शरिरातून निघणे.

लक्षण० स्तनमूल-स्तनरोहित-अपस्तम्भमर्मसु विद्धस्यैकं लक्षणम् ( सुशा. ६.२५ ) श्लेष्मज्वरलक्षणम् ( चनि. १.२७ )



एक लक्षण. स्तनमूळ स्तनरोहित अपस्तंभ या मर्मांवर आघात झाल्याने हे लक्षण होते. कफज्वरातही हे लक्षण होते.

रोग० अशीतिवातरोगेष्वेकः (कासू. २७.१९-२९) श्वसनरोग० ( चसू. १.१०८ ) अन्तर्मार्गजो रोग० ( चसू. ११.४९ ) महाव्याधि० ( सुउ. ५१.५ ) शीघ्रकारी रोगः (असंनि. ४.२९) हेतुः संप्राप्तिश्च-विदाहि-गुरु-विष्टम्भि-रुक्षाभिष्यन्दिभोजनानि, व्यायामकर्म-भाराध्व-वेगाघातापतर्पणानि आमदोषाभिघात-स्त्री-क्षयरोगप्रपीडनानि, विषमाशनाध्यशन-समशनानि, शीतपान-शीतासन-शीतस्थानानि, धूमानलानिल-रजांसि इत्येतानि श्वासस्य कारणानि ( सुउ. ५१.३ ) आमातिसारवमथुविषपाण्डुज्वरैर्मर्माघातेन च श्वासो भवति ( असंनि. ४ ) उरःस्थो मारुत उदानः प्राणवाहीनि स्रोतांसि प्रविश्य कुपितः सँस्तत्रस्थं कफमुद्धूय श्वासं करोति ( चचि. १७.१७ ) प्रकुपितः प्राणो वायुः श्वासरोगं कुरुते ( सुनि. १.१३-१४ ) प्राणवायुर्विगुणो भूत्वोर्ध्वगश्च भूत्वा कफसंयुतः सञ्छ्वासं जनयति ( सुउ. ५१.४ ) कफपूर्वको मारुतः स्रोतांसि संरुध्य श्वासान्करोति ( चचि. १७.४५ ) कफोपरुद्धगमनो विष्वगास्थितः पवनः स्वहेतुदुष्टः सन्प्राणोदकान्नवाहीनि स्रोतांसि दूषयन्नुरःस्थ आमाशयसमुद्भवं श्वासं कुरुते ( असंनि. ४ ) संख्यासंप्राप्तिः- क्षुद्रकस्तमकश्छिन्नो महानूर्ध्वश्च ( सुउ. ५१.५ ) पूर्वरूपम्-आनाहः पार्श्वशूलो हृदयपीडा प्राणस्य च पर्याकुलत्वम् ( चचि. १७.२० ) हृत्पीडा भक्तद्वेषोऽरतिर्वेदनवैरस्यं च ( सुउ. ५१.६ ) शङ्खभेदः ( असंनि. ४ ) पूर्वरूपे बाल उरसानिष्टनति अस्य च श्वासोऽत्युष्णो भवति (कासू. २५.१७) एतानि श्वासपूर्वरूपाणि । सामान्यलक्षणम्-श्वसनवृद्धिः । क्षुद्रश्वासलक्षणम्-तत्र आयासातिभोजनैः प्रेरितो वायुः क्षुद्रनामानं स्वयं संशमनं श्वासं जनयति ( असंनि. ४ ) यस्य किञ्चित्कर्मारभमाणस्य पुरुषस्य यः श्वासः प्रवर्तते निषण्णस्य शान्तिमेति स क्षुद्रः श्वासः (ड.सुउ.५१.७) तमकलक्षणम्-पवनः प्रतिलोमं सिरा गच्छन् कफमुदीर्य शिरो ग्रीवां च परिगृह्य पार्श्वमुरश्च पीडयन्कासं घुर्घुरकं मोहमरुचिं पीनसं तृषं तीव्रवेगं प्राणोपतापिनं च श्वासं च करोति । तद्वेगेनातुर-

स्ताम्यति । निष्ठ्यूत्यनन्तरं सुखमाप्नोति क्षणम् । शयानः कृच्छ्राच्छ्वसिति । निषण्णः स्वास्थ्यमृच्छति । उच्छ्रिताक्षत्वं ललाटे स्वेदोद्गमः शुष्कास्यतोष्णकामित्वं कम्पश्च भवति ( असंनि. ४ ) स शाम्यति कफे हीने ( सुउ. ५१.९-१० ) प्रतमकलक्षणम्–तमकस्यैव भेदः प्रतमकः (चक्र. चचि. १७.६३-६४) यदा तमको ज्वरमूर्च्छायुतः शीतोपशयश्च तदा स प्रतमकसंज्ञः ( सुउ. ५१.१०; असंनि. ४ ) छिन्नश्वासलक्षणम्–छिन्नश्वासेन सविरामं श्वसिति मर्मच्छेदरुजार्दितः स्वेदमूर्च्छायुतः सानाहो बस्तिदाहनिरोधवानधोदृष्टिर्विप्लुताक्षो रक्तैकलोचनो मुह्यञ्च्छुष्कास्यः प्रलापवान्दीनो नष्टच्छायो विचेतनश्च भवति ( असंनि. ४; असंउ. ५१.११ ) महाश्वासलक्षणम्–ऊर्ध्वं नीयमानो वातः सशब्दो मत्तर्षभ इवोच्चैः श्वसिति । महाश्वासी प्रनष्टज्ञानविज्ञानो विभ्रान्तलोचनो विवृताननो बद्धमूत्रवर्चस्कः क्लान्तमना भवति । तदा प्रश्वसितं च दूराद्विज्ञायते ( चचि. १७.४६-४८ ) शुष्ककण्ठो मोहितः कर्णशङ्खशिरोरुजावान्भवति वक्षश्च समाक्षिपति ( असंनि. ४ ) ऊर्ध्वश्वासलक्षणम्–ऊर्ध्वश्वासपीडितो दीर्घकालमूर्ध्वं श्वसिति, श्वासं न अधः करोति । श्लेष्मावृतमुखस्रोतस्त्वेन क्रुद्धो वायुस्तेन पीडित ऊर्ध्वदृष्टिर्विपश्यन्विभ्रान्ताक्ष इतस्ततः प्रमुह्यञ्च्छुष्कास्यो वेदनार्तश्चारतिपीडितो भवति ( चचि. १७.४९-५१ ) हृद्बस्त्यादिमर्मसु आकृष्टत्वमिव हतस्वरत्वं च भवति (सुउ. ५१.१३) छिद्यमाने मर्मणीव वेदनावान्निरुद्धवाक्च भवति ( असंनि. ४ ) साध्याऽसाध्यता–क्षुद्रश्वासः साध्यस्तमकः कृच्छ्रसाध्यः । महोर्ध्वच्छिन्नस्त्रयः श्वासाः सर्वसम्पूर्णलक्षणा असाध्याः (सुउ. ५१.१४) बलिनां नवश्चेत्तमकश्वासः साध्यः (असंनि. ४ ) ऊर्ध्वश्वासारिष्टलक्षणम्–गतोष्मत्वं शूलोपहतवङ्क्षणत्वम् अप्राप्तसुखत्वं चेति रिष्टलक्षणम् ( चइ. ९.१३ ) ज्वरमूर्च्छाद्युपद्रवयुक्तौ प्रतमकसन्तमकावसाध्यौ ( सुउ. ५१.१४ ) चिकित्सा–सामे त्वामविधिं चरेत् ( अहृचि. ४.१६ ) बलवतां श्वासरोगिणामादौ स्नेहस्वेदैरुपाचरेत् । पश्चाद्वमनं विरेचनं च हितम् । श्वासे स्नेहबस्तिः कदापि न देयः ( सुउ. ५१.१५-३६ ) कफग्रस्ते वमनमुपयुक्तम् । वातकफानुबन्धे धूमं प्रयोजयेत् । धूमाः सर्वे ससर्पिष्का योज्याः ( सुउ. ५१.४७-५२ ) तृषितः श्वासी दशमूलक्वाथं पिबेत् ( चचि. १७.१०५ ) कफरुद्धमार्गशुद्ध्यर्थं मुहुर्मुहुर्लेहा देयाः ( चचि. १७.१२० ) पथ्यम्–श्वासार्दिती दन्तपवनं न भक्षयेत् ( अहृसू. २.४ ) ८० वातरोगापैकी एक रोग. श्वास, दमा, मोठा रोग; अंतर्मार्गातील रोग. त्वरेने नाश करणारा. **कारणे**–घशाशी जळजळ करणारे, जड, अवष्टंभक, रूक्ष, कफस्रावी आहार. जेवणावर जेवण, अकाली पुष्कळ किंवा थोडे खाणे. पथ्यापथ्य एकत्र खाणे असा आहाराचा अव्यवस्थितपणा. थंड पेये, थंड बैठक, थंड जागा, अधिक लंघन, मळमूत्राचे विसर्जन करण्याचे वेग अडवणे, अतिसंभोग, अतिव्यायाम, अतिमार्गक्रमण, अतिभार वाहणे; धूर, धूळ श्वासात जाणे, आमदोष, आमातिसार, ओकारी, पांडु, ज्वर, विष, क्षयरोग व मर्मावर आघात झाल्याने श्वास होतो. **संप्राप्ति**–उरःस्थानातील उदानवायु प्राणवाही स्रोतसात तेथील कफाला वर ढकलून श्वासाला अडथळा निर्माण करतो. त्यामुळे श्वास वाढतो. कफाने प्राणवहस्रोतसात प्राणाच्या वहनाला सर्वत्र अडथळा केल्याने श्वासाला अडथळा होऊन तो वाढतो. दूषितकफ आमाशयातील अन्नपाणी व प्राणवाही स्रोतसे दुष्ट करतो व तेथून उरःस्थानातील प्राणवाही स्रोतसे दुष्ट करून कफाला वाढवून श्वासाला अडचण करून श्वास उत्पन्न करतो. हा आमाशय समुद्भव श्वास होय. प्राणवायु दुष्ट होऊन कफासह श्वासाला अडचण करून श्वास उत्पन्न करतो. **श्वास रोगांची संख्या व प्रकार**—५ श्वास. क्षुद्रक, तमक, छिन्न, महा व ऊर्ध्व. **पूर्वरूपे**—जेवणाचा तिटकारा, विरस तोंड, पोटफुगी, फासळ्यात व कानशिळात शूल, हृदयात वेदना व प्राणवायूच्या संचारास अडथळा होतो. **मुलांमध्ये**—छातींतून कण्हणे किंवा त्रासदायक ढेकर देणे आणि श्वास अति उष्ण असणे ही चिन्हें होतात. **सामान्य लक्षण**—श्वास वाढणे. ढग येणे, थंडी, पूर्वेचा वारा, पाण्याने भिजणे यांनी येणारा तमक व बाकी तीन अति त्रास दायक असतात. **क्षुद्रश्वास**—अतिश्रम व अतिभोजनाने वायु प्रकुपित होऊन श्वासाची उत्पत्ति होते व अशा त्या व्यक्तीने विश्रांती घेतली व अन्न पचले

की तो थांबतो. असे क्षुद्रश्वासाचे लक्षण आहे. **तमकश्वास**—प्रतिलोम झालेला वायु सिरांमध्ये प्रविष्ट होऊन कफाला वाढवतो. व डोके आणि मान बरगड्यात पीडा, छाती दुखणे, खोकला, घुर्घुर असा आवाज, मोह, अरुची, पडसे, तहान उत्पन्न करून अति तीव्र वेगी, जीव कासविस करणारा श्वास निर्माण करतो. त्यामुळे श्वासाचा वेग आला की रोगी व्याकुळ होतो आणि कफ निघून वेग शांत झाला की त्याला क्षणभर बरे वाटते. झोपला की श्वासाला कष्ट होतात, बसून बरे वाटते, डोळे बाहेर आल्यासारखे होतात. कपाळावर घाम, तोंड कोरडे पडणे, उष्ण पदार्थाची इच्छा, आणि कंप ही लक्षणे होतात. कफ कमी झाला की हा श्वास शमतो. **प्रतमकश्वास**—हा तमकश्वासाचाच भेद आहे. जेव्हा तमकामध्ये ताप, व मूर्च्छा येते, थंड उपचारांनी बरे वाटते तेव्हा तो प्रतमक म्हणावा. **छिन्नश्वास**—काही वेळ शांत जाऊन पुन्हा श्वास वाढतो, मर्मस्थानी पीडा अगदी भेद केल्यासारखी होते, घाम, मूर्छा, अवष्टंभ, ओटी पोटात दाह, दृष्टि व्याकुळ, डोळे लाल, बेशुद्धि, तोंड कोरडे, बडबड, हीनदीनावस्था. शरीर निस्तेज, अचेतन होते. **महाश्वास**— वायु ऊर्ध्व गेला की माजलेल्या बैलाच्या हुंबरण्यासारखा व उंच आवाजयुक्त श्वास होतो. असा हा महाश्वासी शुद्ध बुद्ध विसरतो, डोळे भ्रमिष्टासारखे होतात, तोंड उघडेच ठेवतो, मलमूत्राचा अवरोध, अत्यंत गलित मनाचा होतो,याचा श्वासोच्छ्वास दुरूनच ऐकू येतो, त्याचा गळा सुकतो, बेशुद्धि येते, कान, कानशील व डोक्यात पीडा होते, छाती आवळतो. **ऊर्ध्वश्वास**— ह्या रोग्याचा श्वास वरवरच अधिक घेतला जातो, सोडता येत नाही. स्रोतसांची तोंडे कफाने आवृत झाल्यामुळे वायु कुपित होतो. त्यामुळे दृष्टि ऊर्ध्व जाते, भ्रमिष्टासारखा इकडे तिकडे पाहतो, बेशुद्धि येते, तोंड सुकते, भयंकर पीडा व निरुत्साह, हृदयादि मर्मस्थानी ओढ लागल्यासारखे वाटते; आवाज अगदीच नष्टप्राय झालासा होतो, मर्मस्थाने तोडली जात आहेत अशी वेदना होऊन वाणी अडखळते. **साध्यासाध्यता**— क्षुद्रश्वास साध्य; तमकश्वास कष्टसाध्य; महाश्वास, ऊर्ध्वश्वास व छिन्नश्वास हे तीन जर सर्व संपूर्ण लक्षण युक्त असतील तर असाध्य होतात. तमकश्वासाचा रोगी बलवान असेल तर साध्य. **ऊर्ध्वश्वासात अशुभ लक्षणे**— शरीर उष्णता नष्ट होणे. जांघाड्यात पीडा, आणि अति अस्वस्थता. ज्वर, मूर्च्छादि उपद्रव युक्त प्रतमक व संतमकश्वास असाध्य. **चिकित्सा**— जर श्वासामध्ये आमाचा संबंध असेल तर तो उपचार करावा. शक्ति चांगली असेल तर प्रथम स्नेह स्वेद विधी करावे; नंतर वमन विरेचन द्यावे. **स्नेह बस्ती श्वासांत कधीही देऊ नये.** कफाधिक्य असेल तेव्हां वमन देणे चांगले. वातकफाचा अनुबंध असेल तर औषधी धूमपान द्यावे. धूमाचे सर्व प्रकार तूपयुक्त द्यावे. तहान असेल तर श्वासाच्या रोग्याने दशमूळकाढा प्यावा. कफाचा अडथळा दूर करण्यासाठी वारंवार चाटण द्यावे. श्वासाच्या रोग्याने दातवण करू नये.

**–कासकरिकेसरिन्**–पु., **पारदादियोग० तारताम्रपारदादिसाधितोऽयं श्वासकासघ्नः** ( र. १३.६४-६५ )
श्वास खोकलारूपी हत्तींचा ( मारक ) सिंह. पाऱ्याचा एक योग. रुपे, तांबे, पारा इत्यादियुक्त योग. हा श्वास, खोकला नाशक.

**–कासहरी वटी**–स्त्री., **गुटिकाकल्प० श्वासकासघ्नी** ( र. १३.६८ )
श्वास खोकला हारक वटी.

**–घ्नवटक**–पु., **सिद्धयोग० श्वासकासज्वरादिहरः** ( र. १३.५५-५८ )
श्वासनाशक वडा. श्वास, खोकला, ज्वर इत्यादी नाशक.

**–प्रतिषेध**–पु., **अध्यायसंज्ञा०** ( सुउ. ५१.१ )
अध्यायाचे नाव. यात श्वासाचे उपचार सांगितले आहेत.

**–भक्ष**–पु., **वनस्पति० बर्बुरः** ( रापरि. ८.१३ )
बाभूळ.

**–रोध**–पु., **लक्षण० श्वासावरोधः** ( असंनि. ५ )
श्वासास अडचण वाटणे. श्वासास अडथळा—अवरोध होणे.

**–शमनवर्ग**–पु., **श्वासहरगणः। चण्डाऽम्ल-वेतस-शठी-तामलकी- सुरसा-हिङ्गु-जीवन्ती- पुष्करमूलैलागरूणि इत्ययं वर्गः श्वासशमनाय भवति** ( असंसू. १५ )
श्वासनाशक वर्ग. ओवा, अम्लवेतस, कचोरा, भुईआवळी, तुळस, हिंग, दोडी, पुष्करमूळ, वेलदोडा, अगरू.

**–हरद्रव्य**–न., द्रव्य० ( चसू. ४.८ ) श्वासशमनवर्गः **शटीपुष्करमूलाम्लवेतसैलाहिंग्वगरुसुरसातामलकी-जीवन्तीचण्डाश्चेति श्वासहरद्रव्याणि** (चसू. ४.१६)
श्वास नाशक द्रव्ये— कचोरा, पुष्करमूळ, अम्लवेतस, वेलदोडा, हिंग, अगरू, तुळस, भुईआवळी, दोडी, ओवा.

**श्वासान्तक**–पु., सिद्धयोग० श्वासकासादिहरः ( र. १३.५४ )
श्वासनाशक एक योग.

**श्वासारि**–पु., वनस्पति० **पुष्करमूलम्** ( रा. ६.९३ )
पुष्करमूळ.
**पाठा** ( ध. १.७१-७२ ) पहाडमूळ.

**श्वासिकी**–वि., श्वासशमनविषयिणी, श्वासविकारशमनी **चिकित्सा** ( चवि. ५.२६ )
श्वासासंबंधीची, श्वासविकार शमन करणारी चिकित्सा.

**श्वासिन्**–वि., **श्वासयुक्तः** ( सुसू. २९.१४ )
श्वास असलेला. (रोगी).

**( श्वासि–)-शस्त**–वि., **श्वासरोगिणां हितकरं द्रव्यम्** ( सुउ. ५१.४६ )
श्वासरोग्यांना हितकर द्रव्य.

**श्वित्र**–न., रोग० ( चचि. ७.१६२ ) **कुष्ठभेदः** ( सुचि. ९.११; असंनि. १४ ) **श्वेतकुष्ठम्** ( र. १.३५ ) **श्वेतभावाच्छ्वित्रम्** ( का.कुष्ठचि. ) **रक्तदोषजरोगेष्वेकः** ( चसू. २८.१३ ) **श्वित्रे दोषतो वर्णभेदः लक्षणं च–वाताद्रूक्षमरुणम् पित्तात्कमलपत्रवत्ताम्रं सदाहं रोमध्वंसि च । कफाच्छ्वेतं घनं गुरु सकण्डु च** ( असंनि. १४ ) **दूष्यविशेषेण वर्णभेदः–रक्ताश्रिते दोषे रक्तम् । मांससमाश्रिते ताम्रम् । मेद आश्रिते श्वेतम्** ( चचि. ७.१७४ ) **साध्याऽसाध्यता–यद्रक्तलोम तनु पाण्डु नातिचिरोत्थितं मध्यावकाशे उच्छूनं तत् साध्यम्** ( चचि. ७.१७६ ) **यद्रक्तलोमवत् परस्परतोऽभिन्नं सर्वतः प्रसृतं यद्वर्षगणोत्पन्नं तन्नैव सिध्यति** ( चचि. ७.१७५ ) **एतत्कुष्ठादपि बीभत्सं यतः शीघ्रमसाध्यतां याति तस्मादेतच्छान्त्यै क्षिप्रं प्रयतितव्यम्** ( असंचि. २२ ) **चिकित्सा–श्वित्रे स्फोटजननं प्रथमं कर्म कर्तव्यम् । स्फोटभेदादनन्तरं तैलप्रयोगेण रोपणादिकर्म कर्तव्यम्** ( सुचि. ९.१५-१६ ) **श्वित्रकुष्ठे तुत्थादिलेपयोगः उपयुक्तः** ( सुचि. ९.२७ ) **मयूरतुत्थं श्वित्रापहम्** ( र. २.१३२ ) **असनादिर्गणः श्वित्रकुष्ठादिहरः** ( अहृसू. १५.२० ) **कुक्कुटपुरीषयोगः श्वित्रजित्** ( सुचि. ९.१९-२० ) **आवल्गुजं बीजमग्र्यम् श्वित्रकुष्ठहरालेपे** ( सुचि. ९.२५-२६ ) **गोऽजादिमूत्रं श्वित्रनाशकम्** ( अहृसू. ५.८३ )
कोड. कुष्ठाचा प्रकार, पांढरे कुष्ठ. श्वेतत्व म्हणून श्वित्र. रक्त दोषज रोगातील एक. दोषानुरूप रंगाची छटा निराळी व लक्षणेही निराळी, जसे वातामुळे रूक्ष व तांबुस; पित्ताने कमळाच्या पाकळ्यांप्रमाणे तांबडे आगयुक्त व केशांचा नाश करणारे; कफाने पांढरे, जाड, जड व खाजयुक्त. **दूष्य दृष्टीने**— रंगाचा प्रकार. रक्तज दोषाने रक्तासारखे, मांसाने तांब्यासारखे, तर मेदाने पांढरे. **साध्यासाध्यत्व**—ज्यात लाल लव झाली नाही जे पातळ पांढुरके मधल्या भागात वर उचललेले व फार काळ झालेला नाही ते साध्य. जे तांबड्या लवेने युक्त परस्परात मिसळलेले सर्वत्र पसरलेले व अनेक वर्षांचे ते असाध्य. हे कुष्ठापेक्षाही वाईट. कारण लवकर असाध्य होते. म्हणून त्वरेने उपचार करावे. उपचार—प्रथम स्फोट उत्पन्न करावे. ते फोडावे व तेलाने भरून आणणे इत्यादि क्रिया कराव्या. मोरचूद इत्यादींचा लेप उपयुक्त. मोरचूद कोडनाशक. असनादिगण कोड कुष्ठ नाशक. कोंबड्याची विष्ठा इत्यादी योग, बावची बी गोमूत्रादि मूत्रे, कोडकुष्ठ नाशक, लेप इत्यादी उपचारात उपयुक्त. बावची सर्वांत श्रेष्ठ.

**–कुष्ठारि**–पु., योग० **श्वित्रनाशकः** ( र. २०.२०३ )
श्वेतकुष्ठ नाशक.

**–घ्नतैल**–न., तैल० **श्वित्रनाशनम्** ( र. २०.२२३ )
श्वेतकुष्ठनाशक तेल.

**–घ्नरसायन**–न., सिद्धयोग० श्वेतकुष्ठादिनाशनः ( र. २६.३३-३४ )
श्वेतकुष्ठनाशक रसायन कल्प.

**श्वित्रारि**–पु., पारदादियोग० **पारदगंधकासीसरससुरसाचांगेर्यादिसाधितोऽयं श्वित्रकुष्ठघ्नः** ( र. २०.१९८-२०२ )
पारा, गंधक, तुळस इत्यादींचा योग. श्वित्र कुष्ठघ्न.

**श्वित्रिन्**–वि., **श्वित्ररोगग्रस्तः** ( सुचि. ९.२६ )
कोडाचा रोगी.

**श्वेत**–पु., मूषिक० अयं कफजान् विकारान् करोति (सुक. ७.२५-३०) द्र० 'मूषिक'
एक उंदीर. हा कफज विकार करतो.
वनस्पति० अर्कभेदः शुक्लार्कः (रा. १०.२९)
रुईचा प्रकार. पांढरी रुई.
न., खनिजद्रव्य० श्वेतटङ्कणम् (रा. ६.३१)
पांढरा टाकणखार.
वनस्पति० चन्दनभेदः (ध. ३.९)
चंदनाचा प्रकार.
आहार द्रव्य० तक्रभेदः मथितम् (ध. ६.१८९) द्र० 'तक्र.'
ताकाचा प्रकार. घुसळलेले दही.
रोग० श्वित्रम् (चचि. ७.१७४) कोड.
वि., वर्ण० शुक्लः (अहसू. १२.५४) पांढरा रंग.

**–कन्द**–पु., कन्द० श्वेतपलाण्डुः (रा. ७.१०१)
पांढरा कांदा.

**–(कन्दा)**–स्त्री., वनस्पति० अतिविषा (रा. ६.७)
अतिविष.

**–काकुलीमृग**–पु., सर्प० अयं भूमिशयः (चसू .२७.३७)
एक सर्प. जमिनीवर रहाणारा.

**–काच**–न., लवण० लवणम् (र. ३०.१०४)
काचलवण.

**–काण्डा**–स्त्री., वनस्पति० श्वेतदूर्वा (रा. ८.२२९)
पांढरी दूर्वा.

**–कापोति**–स्त्री., वनस्पति० सोमसमवीर्या महौषधिः । सा निष्पत्रा कनकाभासा मूले त्र्यङ्गुलसम्मिता लोहितान्ता सर्पाकारा 'श्वेतकापोती' इत्युच्यते, सा समूलफलवृन्ता भक्षयितव्या । तस्याः प्राप्तिस्थानम्–कौशिकीं नदीं पूर्वतः योजनत्रयात्मकः वल्मीकयुक्तः क्षितिप्रदेशः, तत्र वल्मीकमूर्धसु इयं लभ्यते (सुचि. ३०.११,३५)
सोमासारखी वीर्यवान मोठी औषधी. हिला पाने नसतात. सोनेरी वर्णाची, मुळाशी दोन अंगुळे जाडीची, लाल कडेची, सर्पाच्या आकाराची असते. ही मूळफळ व देठ यांसह खावी. तिचे प्राप्तिस्थान–कौशिकी नदीच्या पूर्वेस बारा कोसावर वारुळांची जमीन आहे तेथे वारुळावर ही होते.

**–काम्बोजि**–स्त्री., वनस्पति० गुञ्जा (सुचि. १९.४२-४५; असंउ. ३९) गुंजा.

**–काम्भोजी**–स्त्री., वनस्पति० काकमाचीभेदः, काकमाची (ध. ४-३१)
कावळीचा प्रकार.

**–कुन्द**–पु., वनस्पति० करवीरः (ध. ४.१) कण्हेर.

**–कुम्भीका**–स्त्री., वनस्पति० पाटलाभेदः काष्ठपाटला (ध. १.१२२) पाडळप्रकार.

**–कुष्ठ**–न., रोग० श्वित्रम् (र. २०.२१०-२१४)
कोड, पांढरे कोड.

**–क्रिया**–स्त्री., कर्म० भित्त्यादौ सुधालेपादिना श्वेतत्वोपपादकं कर्म (र. २.१०)
भिंत इत्यादी ठिकाणी चुना इत्यादींनी पांढरा रंग देणे.

**–गुञ्जा**–स्त्री., वनस्पति० गुञ्जाभेदः 'द्र० गुञ्जा' (ध. ४.३१)
गुंजेचा प्रकार. पांढरी गुंज. पहा 'गुंजा'

**–घण्टा**–स्त्री., वनस्पति० नागदन्ती (रापरि. ५.२४)
नागदन्ती.

**–चन्दन**–न., वनस्पति० चन्दनभेदः, हरिचन्दनम् (ध. ३.१) पांढरे चंदन.

**–चामरपुष्प**–पु., वनस्पति० काशः (ध. ४.१३०)
कास गवत.

**–चिल्ली**–स्त्री., वनस्पति० चिल्लीभेदः (धपरि. ७.६८) चील. पांढरा चील.

**–जलज**–न., पद्म० कुमुदम् (ध. ४.१५४)
पांढरे कमळ, कुमुद, पुंडरीक.

**–जीर**–न., खनिजद्रव्य० शङ्खजीरकम् (र. २४.२२)
शंखजिरे.

**–जीरक**–पु., वनस्पति० जीरकभेदः (रा. ६.१०२)
पांढरे जिरे. 'जीरक' पहा.

**–टङ्कण**–न., खनिज० टङ्कणभेदः (रा. ६.३१)
'टाकणखार'.

**–दण्डा**–स्त्री., वनस्पति० दूर्वाभेदः, श्वेतदूर्वा, द्र० 'दूर्वा' (ध. ४.१४४)
दूर्वा प्रकार, पांढरी दूर्वा.

**–दूर्वा**–स्त्री., वनस्पति० दूर्वा (ध. ४.१४४)
पांढरी दूर्वा.

**–द्रुम**–पु., वनस्पति० वरुणः (ध. ५.११९) वायवर्णा.

**–द्वीप**–न., देश० चन्द्रद्वीपम् । गंधकप्राप्तिस्थानेष्वेकम् (र. ३.२-३)
चंद्रद्वीप. गंधकाच्या खाणी आहेत अशा स्थानांपैकी एक.

**–नामा**–स्त्री., वनस्पति० **गिरिकर्णिका** ( ध. ४.८४; चसू. १.७७ ) **विष्णुक्रान्ता** ( चसू. १.७७ )
पांढरी गोकर्णी, विष्णुक्रांता.

**–निष्पाव**–पु., शिम्बीधान्यं० **निष्पावभेदः** ( रा. १६.१७५ )
पावटाप्रकार, पांढरा पावटा.

**–नेत्र**–न., रोग० **विंशतिश्लेष्मविकारेष्वेकः, नेत्रयोः श्वेतत्वं पाण्डुरत्वं वा** ( चसू. २०.१७; असंशा. ४
वीस कफ रोगांपैकी एक. डोळ्यांना पांढरेपणा किंवा पांढुरकेपणा.

**–पत्र**–न., पद्म० **श्वेतपद्मम् पुण्डरीकम्** ( रा. १०.२३७ )
पांढरे कमळ, पुंडरीक, कुमुद.

( **–पत्रा** )–स्त्री., वनस्पति० **श्वेतशिंशपा** ( रा. ९.२०० ) द्र० ' **शिंशपा.** '
पांढरा शिसव.

**–पद्म**–न., पद्म० **पुण्डरीकम्** ( ध. ४.१४८ )
पांढरे कमळ, पुंडरीक, कुमुद.

**–पयस्**–न., तक्र० **दध्नो द्विगुणं जलं मिश्रयित्वा कृतं तक्रं श्वेतपयः** ( ध. ६.२११ )
ताक. दह्यात दुप्पट पाणी घालून केलेले ताक.

**–पाक**–पु., वनस्पति० **श्वेतगुञ्जा,** द्र० ' **गुञ्जा** ' ( असंउ. २४ )
पांढरी गुंज.

**–पादता**–स्त्री., लक्षण० **श्वेतपादत्वम्** ( असंशा. ४ )
पांढरे पाय.

**–पिण्डीतक**–पु., वनस्पति० **महापिण्डीतरुः** ( रापरि. ९.३३ )
महापिंडी. एक रक्तदोषनाशक वनस्पती.

**–पुष्प**–पु., वनस्पति० **श्वेतपुष्पनिर्गुण्डी, निर्गुण्डी** ( र. २२.१६०; ध. ४.८१ )
पांढरी निर्गुंडी.
**करवीरः** ( ध. ४.१ ) पांढरी कण्हेर.
**वरुणः** ( ध. ५.११९ ) वायवर्णा.

(**–पुष्पी**)–स्त्री., वनस्पति० **गिरिकर्णिका** (ध. ४.८४)
पांढरी गोकर्णी.
**इन्द्रवारुणी** ( ध. १.२५२ ) कवंडळ. इंद्रावारुणी.

**–पुष्पक**–पु., वनस्पति० **करवीरः** ( रा. १०.२ )
कण्हेर.

( **–पुष्पिका** )–स्त्री., वनस्पति० **पुत्रदात्री** ( रापरि. ३.४७ )
पांढऱ्या फुलांची वाटोळ्या पानांची अति वास येणारी वनस्पती.

**–पोर**–पु., वनस्पति० **इक्षुभेदः। अयं वंशेक्षुवद्गुणः किञ्चिदुष्णो वातहरः** ( सुसू. ४५.१५२ ) द्र० '**इक्षु**'
उसाचा प्रकार. हा वंश नावाच्या उसासारख्या गुणाचा, किंचित उष्ण व वातहर.

**–फला**–स्त्री., वनस्पति० **बृहतीभेदः, श्वेतबृहती** द्र० ' **बृहती** ' ( रा. ४.१२५ )
रिंगणीचा प्रकार. पांढरी रिंगणी.

**–बर्बर**–न., वनस्पति० **बर्बरभेदः, बर्बरिकम्,** द्र० ' **बर्बर** ' ( रा. १२.१७ )
पांढरी बाभूळ. बाभळीचा प्रकार.

**–बीज**–पु., शिम्बिधान्य० **कुलत्थः** ( रा. १६.१६६ )
कुळीथ. पांढरा कुळीथ.

**–बृहती**–स्त्री., वनस्पति० **बृहतीभेदः** ( रा. ४.१२५; असंशा. १ ) द्र० ' **बृहती** '
रिंगणीप्रकार. पांढरी रिंगणी.

**–भण्डी**–स्त्री., वनस्पति० **अपराजिता** ( चचि. २३.२१० ) विष्णुक्रांता, पांढरी गोकर्णी.

**–मण्डल**–पु., सर्प० **मण्डलिसर्पभेदः** ( सुक. ४.३४(२) ) द्र० ' **मण्डलिन्** '
मंडली सर्प. घोणस, घणस.
न., शारीर० **नेत्रप्रत्यङ्गम् नेत्रे श्वेतवर्णः मण्डलाकारी विभागः** ( सुउ. १.१५ )
डोळ्याचे उपांग. डोळ्यातील पांढराभाग.

**–मन्दार**–पु., वनस्पति० **अर्कभेदः** ( रा. १०.३१ )
पांढरी रुई, मांदार.

**–मरिच**–पु., वनस्पति० **शिग्रुः** ( ध. ४.४० ) शेवगा.
न., **शोभाञ्जनबीजम्** (चचि. २६.२४५) शेवग्याचे बी.

**–महोटिका**–स्त्री., वनस्पति० **बृहतीभेदः,** द्र० ' **बृहती** ' ( रा. ४.१२५ )
रिंगणीप्रकार, पांढरी रिंगणी. पहा ' बृहती '.

**–मुष्कक**–पु., वनस्पति० **मुष्ककभेदः** (ध. ५.१३२) द्र० ' **मुष्कक** '
मोखाप्रकार, पांढरा मोखा, मुष्कक.

**–मूत्र**–न., लक्षण० **श्लेष्मविकार० मूत्रस्य श्वेतत्वम्** ( चसू. २०.१७; असंसू. २० )
पांढरे मूत्र, पांढरी लघ्वी, एक कफरोग.

**–मूल**–पु., वनस्पति० पुनर्नवाभेदः श्वेतपुनर्नवा द्र० ' पुनर्नवा ' ( ध. १.२७६ )
पुनर्नवाप्रकार. पांढरा पुनर्नवा, पहा ' पुनर्नवा '.

**–मोक्षक**–पु., वनस्पति० मुष्ककभेदः (सुचि. ४.३२) द्र० ' मुष्कक '
मोखा, पांढरा मोखा,

**–रोध्र**–पु., वनस्पति० लोध्रभेदः, द्र० ' लोध्र ' ( रा. ६. २४१ )
पांढरा रोध्र.

**–रोहित**–पु., वनस्पति० रोहितकभेदः, द्र० 'रोहितक' ( रा. ८.२१८ )
रोहडा प्रकार, पांढरा रोहडा.

**–वचा**–स्त्री., वनस्पति० वचाभेदः ( ध. २.६ ) द्र० ' वचा '
वेखंडप्रकार. पांढरा वेखंड.
**अतिविषा** ( रा. ६.८ ) अतिविष.

**–वर्ग**–पु., द्रव्यगण० तगर–कुटज–कुन्द–गुञ्जा–जीवन्तिका–श्वेतकमलकन्दाश्चेति द्रव्याण्यत्र। स रस कर्मोपयोगी ( र. १०.९३ )
पांढरा वर्ग–तगर, कुडा, कुंद, पांढरी गुज, हरीण–दोडी, पांढऱ्या कमळाचा कंद हा पाऱ्याच्या संस्कारात उपयुक्त.

**–वर्चस्त्व**–न., रोग० श्लेष्मविकारेष्वेकः श्वेतपुरीषत्वम्, शकृतः श्वेतत्वम् ( चसू. २०.१७ )
कफ विकारातील एक, पांढरा मळ असणे.

**–वर्णता**–स्त्री., लक्षण० श्वेतता, धवलत्वम् ( असंसू. २० )
पांढरेपणा. पांढरा रंग असणे.

**–वारल**–पु., पक्षि० प्लववर्गीयः। शुक्लपक्षः प्रसेवकगलः ' ज्येष्ठबलाका ' इति लोके ( ड. सुसू. ४६.१०५-१०६ )
पाण्यात तरंगणाऱ्या वर्गातील एक पक्षी. मोठा बगळा.

**–वारिज**–न., कमलभेदः पुण्डरीकम् ( ध. ४.१४८)
कमळाचा प्रकार. पुंडरीक, कुमुद.

**–वार्ताकिनी**–स्त्री., वनस्पति० बृहतीभेदः, श्वेतबृहती द्र० ' बृहती ' ( रा. ४.१२५ )
रिंगणीप्रकार. पांढरी रिंगणी.

**–वाह**–पु., वनस्पति० वृक्ष० अर्जुनः ( असंसू. १६; अहृसू. १५.१९ ) अर्जुनसादडा.

**–शकृत्त्व**–न., लक्षण० श्वेतवर्चस्त्वम् ( असंसू. २० )
पांढरा मळ असणे,

**–शालि**–पु., धान्य० अकण्डितशुक्लधान्यम्। शालिभेदः ( चचि. २१.८० ) मागधे पुण्डरीकशालिरिति ख्यातः ( चचि. २१.११३; ध. ६.७१ )
न कांडलेली पांढरी साळ. साळीचा प्रकार. मगधात पुंडरीक साळ म्हणतात.

**–शिंशपा**–स्त्री., वनस्पति० शिंशपाभेदः, द्र० ' शिंशपा ' ( रा. ९.२०० )
पांढरा सिसव. सिसवाचा प्रकार.

**–शिग्रु**–पु., वनस्पति० शिग्रुभेदः, द्र० 'शिग्रु' ( रा. ७.६४ )
शेवग्याचा प्रकार. पांढरा शेवगा.

**–शिम्ब**–पु., शिम्बीधान्य० निष्पावः ( ध. ६.११० )
शेंगातील धान्य. पांढरा पावटा.

**–शिला**–स्त्री., वनस्पति० पाषाणभेदः (रा. ५.२१३)
पाषाणभेद.

**–सार**–पु., वनस्पति० वृक्ष० खदिरभेदः, सोमवल्कः द्र० 'खदिर' ( ध. १.२७ )
खैराचा प्रकार. पांढरा खैर.

**–सिंही**–स्त्री., वनस्पति० बृहतीभेदः द्र० 'बृहती' ( रा. ४.१२५ )
पांढरी रिंगणी.

**–सुरसा**–स्त्री., वनस्पति० निर्गुण्डीभेदः शुक्लशेफालिका, द्र० निर्गुण्डी' ( ध. ४.८३ )
निर्गुंडीचा प्रकार. पांढरी निर्गुंडी.

**–सूरण**–पु., कन्द० सूरणभेदः, सितसूरणः, द्र० ' सूरण ' ( रापरि. ७.८ )
सुरणाचा प्रकार. पांढरा सुरण.

**–स्पन्दा**–स्त्री., वनस्पति० गिरिकर्णिकाभेदः, श्वेतगिरिकर्णिका, अपराजिता, द्र० ' गिरिकर्णिका ' ( ध. ४.८४ )
पांढरी गोकर्णी. विष्णुक्रांता.

**–हस्तता**–स्त्री., लक्षण० धवलपाणित्वम्, हस्तस्य श्वेतवर्णता ( असंशा. ४ )
पांढरा हात असणे. फिकट हात असणे.

**( श्वेता )**–स्त्री., शारीर० त्वग्भेदः। तृतीया त्वक्, लोहितायास्त्वचोऽधो व्रीहिद्वादशभागप्रमाणा यवस्य विंशतिभागेषु द्वादशयवभागाः ($=\frac{12}{20}$ यव) चर्मदल-अजगल्ली-मशकाधिष्ठाना च सा ( सुशा. ४४; असंशा. ५ )

त्वचेचा एक प्रकार. तिसरी त्वचा. लोहिता त्वचेच्या खाली आहे. जवाचा $\frac{1}{12}$ भाग. हिच्यावर चर्मदल, अजगल्ली मशक हे रोग होतात.

**लूता० दंशलक्षणम् – दंशदेशे श्वेता कण्डूमती पिडका भवति । सा दाहमूर्च्छाज्वरकरी विसर्पक्लेद-रुक्करी च** ( सुक. ८.१०३–१०४ ) द्र० **'लूता'** एक विषारी किडा. दंशाच्या जागी पांढरी खाज युक्त पुळी होते. ती दाह, ज्वर, मूर्च्छा, वीसर्प, वेदना, ओला स्राव उत्पन्न करते.

**वनस्पति० सारिवा** ( ध. १.१६१ ) अनंतमूळ.

**अतिविषा** ( ध. १.११ ) अतिविष.

**वचा** (चसू. २.४; सुक. १.६३-६५; असंउ. ४२) वेखंड.

**काश्मरीभेद० काश्मरी** ( रा. ९.१४७ ) शिवण.

**कटभीभेदः श्वेतकटभी श्वेते इति कटभीद्वयम्** ( ड. सुक. ६.१४–२७; असंउ. ६ ) मालकांगोणी, पांढरी गोकर्णी.

**बृहतीभेदः, श्वेतबृहती, द्र० 'बृहती'** (रा. ४.२२५) पांढरी रिंगणी.

**लक्ष्मणा** ( रा. ४.१२३ ) पांढरी रिंगणी.

**रास्ना** ( चसू. ४.१८ ) रास्ना.

**कदलीभेदः, काष्ठकदली** ( ध. ४.७८ ) रानकेळ, लाकडासारखे कडक केळ.

**वंशरोचना** ( रा. ६.८६ ) वंशलोचन.

**पाटलाभेदः, काष्ठपाटला, द्र० 'पाटला'** ( ध. १.१२२ ) पाडळप्रकार. पहा 'पाटला'.

**दूर्वाभेदः, श्वेतदूर्वा द्र० 'दूर्वा'** ( रा. ८.२२९ ) दूर्वाप्रकार, पांढरी दूर्वा.

**पाषाणभेदः** ( रा. ५.२०९ ) पाषाणभेद.

**गिरिकर्णिका** ( असंसू. ८; ध. ४.८४ ) **श्वेतस्पन्दा, अपराजिता इति पर्यायौ** ( चक्र. चचि. १०.४२; असंसू. १४ ) **श्वेतस्यन्दा इत्यपि पर्यायः** ( सुचि. २२.६३; सुक. ५.७५-७६ ) पांढरी गोकर्णी, विष्णुक्रांता. श्वेतस्पंदा, श्वेतस्यंदा, अपराजिता ही आणखी इतर नावे आहेत.

**विषाणिका** ( चचि. १०.४२ ) शतावरी.

**वृक्ष० श्वेतस्यन्दः** ( ड. सुक. १.५१-५४; सुउ. २४. ३२ ) जज्जट ( चचि. ३.२६७)

**श्वेतागुणाः–अतिमधुरा, शीता, स्तन्यदा, रुचिकृच्च** ( रा. ५.४६; पृ. ३४४ ) सुरीसारखी पाने, पेरापेराची मुळे असलेली अविप्रिया किंवा अविक्रिया नावाची वनस्पती.

श्वेतस्यंदा. **गुण**—अति गोड, थंड, रुचिकर, अंगावरचे दूध वाढविते.

**इक्षुविकृति० शर्करा** ( ध. २.१०४ ) साखर.

**श्वेतक**–पु., **वनस्पति० शिग्रुभेदः** ( ध. ४.४० ) शेवग्याचा प्रकार. पांढरा शेवगा.

न., **खनिज० रौप्यम्** ( ध. ६.५ ) रुपे.

**श्वेतटङ्कणम्** ( रा. ६.३१ ) पांढरा टाकणखार.

**श्वेता**–स्त्री., **वन० श्वेताकटभी** ( अहसू. १५.२८ ) पांढरी गोकर्णी, पांढरा वेखंड.

**–युग्म**–न., **वनस्पति० एका किणिहीसंज्ञा अन्या महाश्वेता पालिन्दीसंज्ञा कटभी** ( असंसू. १६; अहसू. १५.२८ ) निळी गोकर्णी व पांढरी गोकर्णी.

**श्वेताक्ष**–पु., **वनस्पति० सोमविशेषः** ( सुचि. २९.५ ) सोमाचा एक प्रकार.

**श्वेतातिदिग्धाङ्ग**–वि., **लक्षण० श्वेतवर्णयुक्ताङ्गः** ( चचि. १६.३२ ) पांढरा रंग युक्त अंगाचा. अगदीच फिकट शरिराचा.

**श्वेतापराजिता**–स्त्री., **वनस्पति० श्वेतगिरिकर्णिका** ( र. १६.९९-१०१ ) **द्र० 'गिरिकर्णिका'** पांढरी गोकर्णी.

**श्वेतपुष्पा विष्णुक्रान्ता** ( र. १६.९९-१०१ ) पांढऱ्या फुलाची विष्णुक्रांता.

**श्वेताम्बर**–पु., **वनस्पति० शितिवारः** ( रा. ४.२०७ ) कुरडू.

**श्वेताम्ली**–स्त्री., **वनस्पति० गुणाः–मधुरा वृष्या बलदायिनी पित्तघ्नी च** ( रापरि. ४.३७ ) श्वेताम्ली. ही गोड, शुक्राला हितकर, बलवर्धक, पित्तनाशक.

**श्वेतारियोग**–पु., **योग० श्वेतकुष्ठघ्नः पलमात्रे पारदे समानं गन्धकं जारयित्वा तत्पारदे पलत्रयं निम्बूक-रसेन संमृदितं गन्धकं प्रक्षिप्य काकोदुम्बरिका–बाकुची–चित्रक-भृङ्गराज–कोरण्टानां क्वाथैः परि-मर्दयेत् । ततश्चैकदिनं कटुतुम्बीक्वाथेन संमर्द्य काचकूप्यां सिकतायन्त्रे यामद्वयं पचेत् । तस्य मात्रा वल्लद्वयम् । अनुपानं कृष्णनागवल्लीपर्णम्** ( र. २०.२१४-२१८ )

४ तोळे पाऱ्यात समभाग गंधक जारण करून लिंबू-रसात पुन्हा १२ तोळे गंधक घालून त्या पाऱ्यासह चांगले मर्दन करावे व काळा उंबर, बावची, चित्रक, माका, कोरांटी ह्यांच्या काढ्यात १|१ दिवस घोटावे. नंतर १ दिवस कडु भोपळ्याच्या रसात घोटून वालुकायंत्रात ते काचकुपीमध्ये ठेवून दोन प्रहर पचवावे. मात्रा २ वाल. अनुपान काळ्या नागवेलीचे पान. हे श्वेतकुष्ठ नाशक आहे.

**श्वेतार्क**–पु., **वनस्पति० अर्कभेदः श्वेतपुष्पोऽर्कः, द्र० ' अर्क '** ( र. ११.५२-५७ )
पांढरी रुई.

**श्वेतार्षभ**–वि., **ऋषभसम्बद्धं** ( चशा. ८.१० )
बैलाचे पांढरे कातडे.

**श्वेतावभासता**–स्त्री., **रोग० श्लेष्मविकारेष्वेकः श्वेतावभासनम्** ( चसू. २०.१७; असंसू. २० )
कफरोगातील एक. शरिरावर पांढरटपणा दिसणे.

**श्वेतेक्षु**–पु., **इक्षु० सितेक्षुः, द्र० ' इक्षु '** ( रा. १४.१८१ ) पांढरा ऊस.

**श्वेतैरण्ड**–पु., **वनस्पति० एरण्डभेदः** ( रा. ८.४४५ ) **द्र० 'एरण्ड'**
एरंडाचा प्रकार. पांढरा एरंड.

**श्वेतोदर**–पु., **सर्प० दर्वीकरभेदः** ( सुक. ४.३४ (१) ) **द्र० ' दर्वीकर '**
नागाचा प्रकार. पांढरे पोट असलेला.

**श्वैत्य**–न., **लक्षण० शुक्लत्वम्** ( अहृसू. १.२७; चनि. ११.७; ) पांढरेपणा.

**श्वैत्र्य**–न., **लक्षण० श्वित्रित्वम्, श्वेतकुष्ठयुक्तत्वम्** ( चसू. २३.२४ ) कोडाने युक्त असणे, पांढऱ्या कोडरोगाने युक्त असणे.

## ष

**षड**–पु., **पेय० दाडिमगोरसादिना घनपल्लवफलादिभिः कृतः तृष्णायामुपयुक्तः** ( सुउ. ४०.९७) **दाडिमतक्रशाकादिसंस्कृतो द्रवः** (ड. सुउ. ४०.२७ )
डाळिंब, दूध इत्यादी मध्ये नागरमोथा पाने, फळे इत्यादी घालून केलेले पेय. तहानेवर उपयुक्त. डाळिंब, ताक भाज्या इत्यादींनी युक्त द्रव.

**(षडी)**–स्त्री., **वनस्पति० सटी ( शठी )** (असंउ.२४; असंउ. ४९ ) कचोरा.

**षडङ्ग**–पु., **वनस्पति० गोक्षुरभेदः, क्षुद्रगोक्षुरः** ( रा. ३.१३१; ध. १.१०२ )
गोखरूचा प्रकार. लहान गोखरू.
**सर्प० मण्डली सर्पः** ( सुक. ४.३४(२) )
साप. घणस, घोणस.
न., **षण्णामङ्गानां समाहारः** ( चसू. ३०.४ ) **तत् शिरोऽन्तराधिर्द्वौ बाहू सक्थिनी च** ( असंशा. ५; चशा. ७.४ )
सहा अंगांचा समुदाय. डोके, धड, दोन हात, दोन पाय अशी सहा अंगे.
**घृत० षट्पलकघृतम्** ( ड. सुउ. ४२.२४ )
' षट्पलघृत ' पहा.
वि., **षडङ्गयुक्तम् शरीरम्** ( सुशा. ५.३ ) **प्रियंगु पिप्पली भद्रमुस्तं हरेणुः, क्षौद्रं, बदरचूर्णं च** ( का. गर्भिणीचिकित्सा )
सहा अंगानी युक्त शरीर. गर्भिणीला द्यावयाचा ६ औषधांचा योग. गहुला, पिंपळी, लहान नागरमोथा, रेणुकबीज, मध, आणि बोरांचे चूर्ण यांनी तयार केलेला योग हृदयाला हितकर आहे.

**षडङ्गगुग्गुलु**–पु., **योग० गुग्गुलुकल्पः । रास्ना–गुडूची–देवदारु–शुण्ठी–एरण्डमूलानि समभागानि गुग्गुलुं च सर्वेषां समभागं मिश्रयेत् । अयं वातरोगे उपयुक्तः** ( र. २१.१६० )
गुग्गुळाचा एक योग. रास्ना, गुळवेल, देवदार, सुंठ, एरंडमूळ हे समभाग व सर्वसमान गुग्गुळ. हा योग वातरोगावर उपयुक्त.

**षडङ्गघृत**–न., **सिद्धघृत० षट्पलघृतम्** ( सुउ. ४२.२४ )
षडंगघृत. षट्पल या नावाने प्रसिद्ध औषधी तूप.

**षडङ्गुलसंमितनेत्र**–वि., **षडङ्गुलसम्मितं नेत्रं यस्य सः ( बस्तिः )** ( चसि. ३.८ )
सहा अंगुले लांबीची नळी ( गुदद्वारात घालावयाची नळी ) ज्याला आहे ते ( बस्तियंत्र ). वयाच्या एक वर्षापासून सहा वर्षापर्यंत प्रत्येक वर्षी एक एक अंगुळ अधिक लांब नळी बस्तीला असावी.

**षडङ्गोदक**–न., **जल० घनचन्दनशुण्ठ्यम्बुपर्पटोशीरैः साधितं जलं षडङ्गोदकम् ।** ( असंचि. ३ ) **तच्च पाचनं तृड्ज्वरापहम् ।** ( अहृचि. १.१५; चचि. ३.१४५ )
नागरमोथा, चंदन, सुंठ, वाळा, पित्तपापडा, काळा वाळा या सहांनी सिध्द केलेले पाणी. हे पाचक तहान व ज्वर नाशक.

**षडिन्द्रिय**–न., **षण्णामिन्द्रियाणां समाहारः, मनसा सह पञ्चेन्द्रियं षडिन्द्रियम्** ( चसू. २६.४३(१)
मन व डोळा इत्यादी पाच इंद्रिये. मनासह ती पाच इंद्रिये मिळून सहा इंद्रिये.

**षण्**–वि., **संख्या० षट्**, सहा.

**–निष्कतैल**–न., **तैलयोग० तैलमिदम् आमवातादिहरम्** ( र. १६.४२-४३ )
एक सिद्ध तेल. हे आमवात, संधिवात इत्यादी हारक.

**–मास**–न., **षण्णां मासानां समाहारः** (असंशा. ९)
सहा महिने.

**–मासोषित**–( परिव० ) वि., **षण्मासं यावत्स्थितः** ( असंसू. २ )
सहा महिने राहिलेला.

**–मुख**–पु., **कार्तिकेयः, उमाशङ्करापत्यं षण्मुखयुक्तम्** ( काचि. )
कार्तिकस्वामी. शंकर पार्वतीचा मुलगा. सहा मुखांचा.

**–( मुखा )**–स्त्री., **वनस्पति० षड्भुजा** ( रा.७.२५५ )
खरबूज. पहा 'षड्भुजा'.

**–( मुखी )**–स्त्री., **ग्रहरोग० बालग्रहः । रेवतीग्रहः । देवताऽपि सा सूतिकापष्ठ्यां पूज्या । तस्याः तिथिः षष्ठी** ( का.बालग्रहचि० )
रेवती नामक बालग्रह. स्त्री बाळंत झाल्यावर सहाव्या दिवशी हिची (सटी) पूजा करावी.

**–मूल**–वि., **षण्मूलानि नाम कारणानि यस्य सः** ( सुचि. १.१३४ )
सहा कारणे ज्याला आहेत तो (व्रण).

**षण्ड**–पु., **नपुंसक० अशुक्रषण्डप्रकारः । स्त्रीचेष्टिताकारः नरषण्डः । तस्योत्पत्तिहेतुः– यो नरो भार्यायामृतौ उत्तानीभूय विपरीतबन्धेन प्रवर्तते ततस्त्रीचेष्टिताकारपुत्रः षण्डसंज्ञको जायते** ( सुशा. २.४१-४२ ) **योषितामपि एतादृशं षण्डत्वं दृश्यते । स नारीषण्डः** ( सुशा. २.४३-४४ )
नपुसक. शुक्र नसलेला. स्त्रियांसारख्या चेष्टा—हावभाव करणारा नपुसक पुरुष. जो पुरुष स्वतः स्त्रीसारखा उताणा पडून स्त्रीशी संभोग करतो, त्याला स्त्रीचे हावभाव करणारा षंढ पुत्र होतो. स्त्रियांमध्येही असे षंढत्व दिसते. तो स्त्रीषंढ.

**( षण्डी )**–स्त्री., **योनिरोग० लक्षणम्– सा बीजदोषात्स्त्रीगर्भस्य वातहतगर्भाशया तेन स्त्री नृद्वेषिणी अस्तनी च भवति । सोऽसाध्ययोनिरोगः** ( चचि. ३०.३४-३५ ) **षण्डी योनिरनार्तवाऽस्तना मैथुने खरस्पर्शा च भवति** ( सुउ. ३८.१८ ) **गर्भे बीजदोषतो जायमाना स्त्री नृद्वेषिणी यौवनेऽप्यस्तनी स्यात्** ( असंउ. ३८ )
योनीचा रोग. बीजातील दोषाने स्त्रीगर्भाच्या गर्भाशयात वाताची दुष्टी होते. ती वातदुष्ट गर्भाशयाची स्त्री स्तन नसलेली व पुरुषाचा द्वेष करणारी असते. तो असाध्य योनिरोग असतो. ही षंढी योनि रजस्राव नसलेली संभोगाला खरखरीत असते.

**षण्ढ**–पु., **नपुंसकः** ( सुशा. २.४१-४२ )
**द्र० 'षण्ड'** नपुंसक.

**–ता**–स्त्री., **स्त्रीगमनाशक्तित्वम्** ( अरु. अहृसू. ४.२० )
षंढत्व. स्त्रीसंभोगाची असमर्थता—अशक्यता.

**–योनि**–स्त्री., **योनिरोग० विंशतियोनिव्यापत्स्वेकः द्र० 'षण्डीयोनिः'** ( चसू १९.४ ( ९ )
एक योनिरोग. वीस योनिरोगांतील एक. पहा 'षंडीयोनि'.

**–संज्ञा**–वि., **योनिरोग० द्र० 'षण्डीयोनिः'** ( असंउ. ३८ )
एक योनिरोग.

**षष्**–**संख्याशब्द०** ( सुसू. १४.३ )
संख्यादर्शक शब्द. सहा.

**( षट् )**–**कल्प**–पु., **अध्याय० तत्र बालानामक्षिरोगशमनार्थं षट् द्रव्याणां कल्पा उक्ताः । तानि द्रव्याणि– चक्षुष्या पुष्पकं माता रोचना रसाञ्जनं कतकफलं च** ( का. षट्कल्प० )
काश्यपसंहितेतील एक अध्याय. यात बालकाच्या नेत्ररोगनाशनासाठी सहा द्रव्यांचे प्रयोग सांगितले आहेत. ती द्रव्ये— ( १ ) रान कुळथाचे बी ( २ ) जस्ताचे फूल ( ३ ) हरीतकी ( ४ ) गोरोचन ( ५ ) रसांजन आणि ( ६ ) निवळीचे बी.

**( षट् )**–**कोण**–न., **रत्न० हीरकः** ( ध. ६.५६ )
एक रत्न. हिरा.

**–कोल**–न., **द्रव्य० षडूषणम्** ( र. २१.१३५ )
सहा तिखट द्रव्यांचा गट. सुंठ, पिंपळी, मिरे, पिंपळमूळ, चवक, व चित्रक ही सर्व द्रव्ये मिळून.

**–कोश**–वि., **षट्कोशात्मकम्** ( काशा. १० )
सहा पुडे असलेला. सहा आवरणे असलेला.

**–पद**–पु., **कीट० भ्रमरादिः** ( चसू. २६.४३; सुसू. ६.२५-२८ ) किडे. भुंगा इत्यादी.

**-पदाभिसरण**-न., लक्षण० **यथा प्रमेहे षट्पदानां देहे तथा मूत्रे च सञ्चारो भवति** ( चनि. ४.४७ )
प्रमेहरोगात रोग्याच्या अंगावर आणि मूत्रावर भुंगे जातात.

**-पदमञ्जरी**-स्त्री., वनस्पति० **अशोकः** ( ध. ५.१५९ )
अशोक.

**-पदातिथि**-पु., वनस्पति० **चम्पकः** ( ध. ५.१४२ )
चाफा.

**-पदानन्दवर्धन**-पु., वनस्पति० **किङ्किरातः** ( ध. ५.१५६ )
काळी कोन्हांटी.

**-पदानन्दा**-स्त्री., वनस्पति० **वार्षिकी** ( ध. ५.१३६ )
तीन कडांची व तीन पुडांची सुगंधी वनस्पती.

**-पल**-न., घृत० ( चसू. २४.५५ )
कडु द्रव्यांनी सिद्ध केलेले हे घृत.

**-पलघृत**-न., घृत० **तत्साधनप्रकारः-पिप्पली-पिप्पलीमूलचव्यचित्रकशृङ्गवेरयवक्षारसैन्धवानां पलिकाभागाः घृतप्रस्थं तत्तुल्यं क्षीरं तदैकध्यं विपाचयेत्** ( सुचि. १४.१४; चचि.५.१४७-१४८ ) **क्षीरषट्पलकं घृतम्, इदं कफात्मकं गुल्मं ग्रहणीं पाण्डुरोगं प्लीहकासविषमज्वराग्निमान्द्यश्वयथूँश्च हरति** ( सुचि. १४.१४; चचि. ५.१४७-१४८; चचि. १५.१७० )
औषधी तूप. पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ, जवखार, सैन्धव ही प्रत्येकी एक पलभाग घेऊन ६४ तोळे तूप समभाग दूध ही सर्व एक करून तूप तयार करावे. हे कफात्मक गुल्म, ग्रहणी, पांडुरोग, प्लीहा, खोकला, विषमज्वर, अग्निमांद्य, सूज नाहीशी करते.

**-पलसर्पिस्**-न., घृत० **षट्पलघृतम् तदिदं प्लीहाग्निसंगादिनाशकम्** ( सुचि. १४.१४ )
पिंपळी, पिंपळमूळ इ० द्रव्यांचे सिद्ध तूप. हे प्लीहा, अग्निमांद्य इत्यादी नाशक. पहा 'षट्पलघृत'.

**-पलसर्पिस्**-न., घृत० **षट्पलघृतम्** ( चक. ) ( चचि. ३.२९८ )
षट्पल घृत. पहा 'षट्पलघृत'.

( षड् )**-ग्रन्थ**-पु., **वृक्ष० करञ्जः** ( चचि. ७.११३ ) **करञ्जभेदः, पूतिकरञ्जः** ( ध. ५.१०९ )
घाणेरा करंज, करंजाचा प्रकार,

-( **ग्रन्था** )-स्त्री., वनस्पति० **वचा** ( सुचि. ९.८; असंचि. १; श्वेतवचा ( ध. २.६ ) पांढरा वेखंड. **सटी** ( शठी ) ( ध. १.६१ ) कचोरा.

**-ग्रन्थादिचूर्ण**-न., चूर्णकल्प० **श्लैष्मिकगुल्मे शूले चोपयुक्तम्** ( सुउ. ४२.७१-७२ )
षड्ग्रंथादि चूर्ण. हे कफज गुल्म आणि शूलावर उपयुक्त.

**-धरण**-पु., योग० **षण्णां चित्रकादीनां धरणा मानविशेषा यत्र योगे, स षड्धरणो योगः। तत्र द्रव्याणि-चित्रक-इन्द्रयव-पाठा-कटुका-अतिविषा-अभया चेति। वातव्याधिप्रशमनोऽयं योगः, आमाशयगतवातस्यैव प्रशामको न त्वाक्षेपकादीनाम्** ( सुचि. ४.४ )
चित्रकादिकांचा योग. धरण म्हणजे एकवीस मध्यम पावव्यांचे वजन. सहा धरण प्रमाणाचा योग. चित्रक, इंद्रजव, पहाडमूळ, कुटकी, अतिविष, हिरडा, ही द्रव्ये. हा योग आमाशयगत वाताचा प्रशामक आहे. आक्षेपक इत्यादिकांचा नाही.
**दार्वीकलिङ्गकटुकातिविषाग्निपाठाः इत्येतेषां सूक्ष्मचूर्णं मूत्रेण सह पीतं अर्शं उदरं कुष्ठमेहकोष्ठगतवातग्रहण्यादीन् रोगान् हन्ति** ( असंचि. २३ )
दारुहळद, इंद्रजव, कुटकी, अतिविष, चित्रक, पहाडमूळ हे चूर्ण गोमूत्राबरोबर घेतल्यास मूळव्याध, उदर, कुष्ट, प्रमेह, कोष्ठगतवात, ग्रहणी इत्यादी रोगांचा नाश होतो.

**-धातुज**-वि., **षड्धातुसमुदायात्मकम् पञ्चमहाभूतानि आत्मा च षष्ठ इति षड्धातवः, तेभ्यो जातम्** ( चसू. २५.१५ )
सहा धातूंपासून झालेला. पाच महाभूते व सहावा आत्मा यापासून निर्माण झालेला.

**-भुजा**-स्त्री., वल्लीफल० **गुणाः- तिक्ता मधुरा किंचित् अम्लविपाका तर्पणी पुष्टिकरी वृष्या मूत्रला कफकरी पित्तघ्नी दाहश्रमोन्मादघ्नी च** (रा. ७.२५५)
हिं.—खर्बुज़.
**म.—खर्बुज.**
गु.—टर्बुज.
बं.—खेर्मुज.
खर्बूज. कडु, गोड, थोडा आंबट पाक होतो. तृप्तिकर व पौष्टिक, शुक्राला हितकर, श्रमनाशक, मूत्रल, कफकर, पित्तनाशक, दाह, उन्माद नाशक,

**-रस**-वि., षड्रसात्मकः ( आहारादिः ) (सुसू. १४.३) सहा रसयुक्त आहार इत्यादी.

**-रात्र**-न., **षण्णां रात्रीणां समाहारः** ( असंशा. ९ ) सहा रात्री.

**-रेखा**-स्त्री., **वनस्पति० षड्भुजा** ( रा. ७.२५५ ) खरबुज. पहा ' षड्भुजा. '

**-विरेचनशताश्रितीय**-वि., **अध्यायसंज्ञाविशेषः** ( चसू. ४.१ ) अध्यायाचे नाव. यात वांती, रेचक इत्यादी उपायांनी दोष शरिराबाहेर काढणारे सहाशे कल्प सांगितले आहेत.

**-विरेचनशतीय**-वि., **अध्यायसंज्ञा०** (चसू. ४.१) अध्यायाचे नाव. पहा ' षड्विरेचनशताश्रितीय '.

**षष्टि**-पु., **धान्य० व्रीहिः** ( रा. १६.१०१ ) तांदूळ. साठे तांदूळ. व्रीहि जातीचा.

**-ज**-पु., धान्य० **षष्टिकः** (रा. १६.८४) साठे तांदूळ.

**-तण्डुलजोद्भवा**-स्त्री., वनस्पति० **वंशरोचनाभेदः** ( ध. २.५६ ) वंशलोचनाचा एक प्रकार. साठे तांदुळापासून झालेला.

**-वासरज**-पु., **धान्य० षष्टिकः** ( रा. १६.८४ ) साठे तांदूळ.

**-शालि**-पु., **षष्टिकः** ( रा. १६.८४ ) साठे तांदूळ.

**षष्टिक**-पु., **शूकधान्य० व्रीहिभेदः** ( चसू. ४.१२; सुसू. ४६.१०; अहसू. ६.७-८ ) **ग्रैष्मिकं धान्यम्** ( सुउ. ३९.३१८-३१९ ) **प्रकृतितो लघुधान्यम्** ( चसू. ५.५ ) **श्रमनाशनगणे प्रोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१६; असंसू. १५ ) **यो व्रीहिः षष्टिरात्रेण पच्यते, स षष्टिकः । षष्टिको व्रीहिषु श्रेष्ठः** ( सुउ. ३९.३१८-३१९; चसू. २७.१३ ) **हितत्वेनाभ्यसनीयमेकं द्रव्यम्** ( चसू. ५.१२ ) **सर्वप्राणिनामाहारार्थं हितम्** ( सुसू. २०.५ ) **वमिनिग्रहणगणे प्रोक्तं द्रव्यम्** ( असंसू. १५ ) **षष्टिको व्रीहिषु श्रेष्ठः । षष्टिकः द्विविधो गौरः कृष्णगौरश्च । तत्र गौरः कृष्णगौरतः श्रेष्ठः** ( असंसू. ६.७-८ ) **गुणाः- स्वादुः शीतो लघुः स्थिरो ग्राही त्रिदोषघ्नः** ( चसू. २७.१३; अहसू. ६.७ ) **बलवर्धनो विपाके मधुरो लोहितशालिभिस्तुल्यगुणः** ( सुसू. ४६.१०-११ ) **बृंहणकर्मकारी** ( अहसू. ४.२८; ध. ६.७२ ) साठे तांदूळ. व्रीहि जातीच्या तांदळाचा प्रकार. हा उन्हाळ्यात होतो. पचावयाला हलका. साठ दिवसात हा तयार होतो. व्रीहि जातीत हा श्रेष्ठ आहे. सर्वांना आहाराकरिता उपयुक्त, हितकर म्हणून नेहमी उपयोगात आणावा. साठे तांदूळ दोन प्रकारचा- पांढरा व काळसर पांढरा. यात पांढरा श्रेष्ठ. थकवानाशक व वांतीहारक वर्गात हा आहे. गोड, पचल्यानंतर गोड, थंड, हलका, मळ बांधणारा, स्थिरत्व निर्माण करणारा. बलवर्धक. पौष्टिक. तिन्ही दोषनाशक. तांबड्या साळीच्या भाताच्या गुणांचा.

**-मूल**-न., **शूकधान्यविशेषस्य मूलम् । तत्स्तन्यजनकम्** ( चसू. ४.१२; असंसू. १५ ) साठे तांदुळाचे मूळ. ते अंगावरचे दूध वाढविते.

**-वर्ग**-पु., **गण० षष्टिक-काङ्गुक-मुकुन्दक-पीतक-प्रमोदक-काकलकासनपुष्पक- महाषष्टिक -चूर्णक-कुरबक-केदारप्रभृतयः षष्टिकाः** ( सुसू. ४६.८ ) षष्टिक कांगुक वगैरे वरील नावापेक्षा अधिक प्रकार साठे तांदुळाचे आहेत.

**षष्टिकादिगुटिका**-स्त्री., **योग० गुटिका कल्पः । अयं योगो वृष्योऽपत्यकरश्च** ( चचि. २ (२). ३-९ ) साठे तांदूळ इत्यादिकांची गुटिका. शुक्रवर्धक व संततिकर.

**षष्टिकौदन**-पु., **योग० शुभ्रं षष्टिकौदनं घृतेन सह पयसि पक्त्वा शर्करामधुसंयुक्तं कुर्यात्, अयं वृष्यः** ( चचि. २.(२)२७ ) पांढरा साठे तांदूळ. तूप घालून दुधात शिजवून साखर व मध घालून खावा. हा शुक्रवर्धक आहे.

**षष्ठी**-स्त्री., **बालग्रह० रेवतीग्रहस्य नाम । नन्दिकेश्वरपञ्चमानां भ्रातॄणां षष्ठी भगिनी** ( काबालग्रहचि. ) **सा षष्ठेऽह्न्यपत्यं विनाशयति** ( कारेवतीक० ४५ ) बालग्रह. नंदिकेश्वर वगैरे पाच भावाना ही सहावी बहीण रेवती नावाची ग्रहरूप आहे. हा रेवतीग्रह सहाव्या दिवशी बालकाला मारतो.

**-ग्रह** पु., **बालग्रह० स क्षीरदुष्टिहेतुः** ( कासू. १९ ) बालग्रह., दूषीत दूध पाजल्याने मुलाला होतो.

**-निशा**-स्त्री., **सूतिकायाः षष्ठी निशा । सूतिकाषष्ठी,** (का.बालग्रहचि.) **अस्यां बालहिताय रक्षाबलिक्रिया कर्तव्या** ( असंउ. १ ) बाळंतिणीची सहावी रात्र. या रात्री मुलाच्या हिताकरिता-आरोग्याकरिता बलि इत्यादी रक्षाकर्म करावे.

**षाडव**–पु., **कृतान्न० व्यञ्जन० मधुराम्लद्रव्यकृतो द्रवपदार्थः पानक०**
( चसू. २७.२८१; सुसू. ४६.३७८ )
तोंडी लावणे. पन्हे. गोड आंबट द्रव्यांनी केलेले पातळ पेय.
**यूष०** ( सुउ. ४७.२५-२६; चचि. ११.८८-९० )
कढण.
**व्यञ्जन० राजिकया संस्कृतः जम्बूफलरसैः सिता-रुचकसिन्धूत्थैः सवृक्षाम्लपरूषकैर्युक्तो रागषाडवः। षाडवाः पुनर्मधुराम्ललवणसंयोगजाः नानाविधाः** ( सुसू. ४६.३८३ ) **मधुराम्लकटूनां तु संस्काराः षाडवा मताः** ( ड. सुउ. ५७.१२ )
जांभळाच्या फळाच्या रसात खडीसाखर, पादेलोण, सैंधव, अमसूल, फालसा घालून मोहरी लावून केलेले रायते. गोड, आंबट, मीठ तिखट यांच्या संयोगाने नाना प्रकारच्या चटण्या, कोशिंबरी, रायती करतात. त्या सर्वांना षाडव म्हणतात.

**षाण**–पु., **मान० शाजः, धरणद्वयम्, माषचतुष्टयम्, तोलकपादः। इति मानम्** ( र. ११.३ )
चार मासे. पाव तोळा.

**षाण्ढ्य**–न., **रोग० षण्ढस्य भावः** ( सुचि. ९.८ ) **अशीतिवातरोगेष्वेकः** ( कासू. २७.१९-२९ ) **नपुंसकत्वम्** ( चसू. २६.१०२ ) **विरुद्धाशनजो रोग० क्लीबत्वम्** ( चसू. २६.८४ ) **लक्षण०**
( सुशा. ६.२४ )
षंढत्व. नपुंसकत्व. ऐशी वातरोगात एक. विरुध्द आहार घेतल्याने होणारा.

**षाण्मासिकरसायन**–न., **योग० षण्मासायस्य योगस्य प्रयोगाज्जरा कार्श्यं च विनश्यति** ( र. २६.१२-१३ )
सहा महिने सेवन केल्याने ज्या रसायन औषधाने कृशपणा व म्हातारपणा नाहीसा होतो ते रसायन.

**षोडश**–वि., **संख्या०** ( चसू. १०.३ ) सोळा.
**–कल**–वि., **षोडशगुणम्। कलाशब्दो गुणवचनः**
( चक्र. चसू. १०.३ )
कला म्हणजे गुण. सोळा गुणांचा उपचार. रोगी, वैद्य, औषध आणि परिचारक ह्या प्रत्येकाचे ४ या प्रमाणे एकूण १६ गुण उपचाराला आवश्यक.
वि., **षोडशविकारात्मकः ( चिकित्साधिकृतकर्म-पुरुषः )** ( सुउ. ६६.७ )
सोळा विकारांचा. पाच भूते व अकरा इंद्रिये या सोळा विकारांचा पुरुष.
**–गुण**–वि., **षोडशभागम्** ( अहृसू. १४.२७ )
सोळापट.

**षोडशिका**–स्त्री., **मान० पलम्** ( चक. १२.९२ )
चार तोळे.
**कर्षः** ( असंक. ८ ) एक तोळा.
**–तैल**–न., **कर्षपरिमाणं तिलतैलं तालस्य सत्वपातनार्थ-मुपयोज्यम्** ( र. ३.८८ )
एक तोळा तिळाचे तेल, हरताळाच्या सत्वपातना-करिता उपयोगी.

**ष्ठीवन**–न., **कर्म० मुखस्रावोद्गारः** ( अरु. अहृसू. १२.५ ) **लक्षण० मुखात्कफादीनां बहिर्निक्षेपणम्**
( सुसू. १६.७; अहृसू. ८.९ )
थुंकणे, तोंडातून कफ वगैरेयुक्त थुंकी थुंकणे.
वि., **ष्ठीवनार्थं कफोत्क्लेशार्थमुपयुक्तं ( द्रव्यम् )** ( चचि. १५.१९८ )
कफ उचंबळून यावा व थुंकून बाहेर टाकावा म्हणून उपयुक्त औषधे.

## स

**संयत**–वि., **संयमनशीलः, संयमी** ( सुचि. २४.११३ )
संयम ठेवणारा, संयमी, मनोनिग्रही.
**बद्धम् पाशादिना** ( सुउ. ६२.१८ )
बांधलेला, दोरी इ० नी बांधलेला.

**संयतात्मन्**–वि., **जितेन्द्रियः** ( सुशा. ३.२४ )
जितेंद्रिय, आत्मसंयमी, जितात्मा.

**संयाव**–पु., **भक्ष्य० उत्कारिका** ( चक्र. चचि. ३०.१०७ )
खाण्याचा पदार्थ, गाकर, हारोळी, सांजा, चुरमा.
**यवौदनः** ( इन्दु. असंउ. ४ )
जवाचा भात, अन्नाचा प्रकार.
**मधु ( घृत ) दुग्धेन सुशोभनां समितां मर्दयित्वा घृतोत्तरे खण्डे पचेत्। खण्डैलामरिचार्द्रकचूर्णानि चास्मिन् क्षिपेत्। स च संयावः संपद्यते। स गुरु-र्बृंहणश्च** ( सुसू. ४६.३९५-३९६ )
सपीट किंवा कणिक घेऊन तीत थोडी साखर मिरी व सुंठ यांचे चूर्ण आणि मध व दूध घालून मळून सुंदर दिसेल अशी गोल पुरी करून कढईत तुपामध्ये तळावी. हा संयाव–पुरी जड व पौष्टिक आहे.
**नातिमृदुकठिनः समिताशर्कराकृतभक्ष्यविशेषः**
( सुनि. ८.१० )
सपीट व साखर यांचा बनवलेला अति मऊ अति कडक नसलेला खाण्याचा पदार्थ, गाकर, हारोळी.

**संयोग**–पु., **संबन्धः, ( धर्माधर्मादिभिः )** (चशा. ५.२१)
संबंध. धर्माधर्म इ० मुळे आलेला.
**द्रव्याणामुचितं मेलनम्, संहतीभावः** (चसू.४.९२; सुसू. २०.३ ) द्रव्यांचे योग्य मिश्रण.
**–पुरुष**–पु., **चतुर्विंशतिको राशिपुरुषः** (चशा. १.८५)
चोवीस तत्वांच्या संयोगाने होणारा राशिपुरुष.
**–विरुद्ध**–वि., **मेलनाद्विरुद्धत्वमापन्नम्** (चसू. २६.९९)
मिश्रणाने विरुद्ध बनलेले आरोग्याला घातक होणारे.
**–शरमूलीय**–वि., अध्यायसंज्ञा० ( चचि. २ ( १ )
अध्यायाचे नाव. यात बाणगवताच्या मुळांचा संयोग असलेले तूप प्रथम उपचार म्हणून सांगितले आहे.

**संयोजन**–न., **संहननं सङ्घातो वा** ( चवि. ८.११६ )
घट्ट संयोग, दृढ संयोग, कठिण, टणक, घट्ट.
**संयोगः, विध्युक्तं मिश्रणम्** ( असंसू. २८.४१-४२)
संयोग. विधिपूर्वक मिश्रण.

**संरब्ध**–वि., **क्षुब्धम्** ( सुउ. ६.१६ )
संचित, साठलेले, क्षुब्ध.
**सम्यक्कलितः** ( ड. सुउ. २७.९ )
आवेशात येऊन थरकाप होत असलेला,कापरे भरलेला.
**विशालमूलः** ( सुचि. १.२९ )
मोठ्या मुळाचा. आत अधिक पसरलेला.
**–नेत्र**–वि., **लक्षण० सशोथलोचनः** ( ड. सुउ. ५१.१२ )
सुजलेला डोळा. क्षुब्ध डोळा. लालभडक डोळा.

**संरम्भ**–पु., **आरभटी** ( चक्र. ) **शौर्यम्** ( चचि. ९.१२)
दांडगाई, शूरपणा.
**कोपः** ( इन्दुः असंउ. १ ) राग, क्रोध, संताप.
**लक्षण० चित्तक्षोभः** ( चनि. ७.७ ( २ )
मनाचा क्षोभ.
**श्वयथुरागवेदनाप्रादुर्भावः** (सुसू. १६.६; सुउ. १३.१८ ) सूज, लाली, वेदना उत्पन्न होणे.

**संरम्भिन्**–वि., **शोथवत्** ( **व्रणादिः** ) ( सुनि. ४.७ )
सुजलेला. ( व्रण इ० )

**संराग**–पु., **कामः** (ड. सुउ. ५७.६) काम, विषय, प्रेम.

**संरोष**–पु., **संक्षोभः** ( सुउ. १५.३ )
क्षोभ. ( पापणीतील अर्मनामक रोग शिथिल करण्यासाठी डोळ्यात क्षोभ निर्माण करणे)

**संरोहण**–न., **सम्यग्विरोपणम्** ( चनि. ५.७ )
चांगल्या तऱ्हेने रुजविणे. भरून आणणे. (जखम)

**संलीन**–वि., **एकस्थानस्थितः निश्चलः** (असंशा. ४.२३)
एकाच ठिकाणी असलेला, निश्चल, स्थिर, अचल.

**संलुलन**–न., **स्फुरणं हर्षः** ( असंशा. २.९ )
स्फुरण, हर्ष, आनंद.

**संलोच**–पु., **लुञ्चनवद् वेदना** ( सुउ. ४१.१२ )
उपटल्यासारख्या वेदना.

**संवत्सर**–पु., **द्वादशमासात्मकः कालः, वर्षम्** ( सुसू. ६.४; चसू. ६.४ )
बारा महिन्यांचा काळ, वर्ष.
**–प्रयोग**–पु., **वर्षपर्यन्तं भैषज्यस्य सेवनम्** ( चचि. १(२).११ )
वर्षभर औषधाचे सेवन.

**संवत्सरात्मन्**–वि., **संवत्सरस्वरूपः ( कालः )** ( सुसू. ६.४ )
वर्षात्मक, वर्षरूपी (काल).

**संवत्सरोषित**–वि., **वर्षस्थितम्, पुराणम्** ( सुसू. ४६.५१ )
वर्षभर ठेवलेला. वर्षाचा जुना. बारा महिन्यांच्या काळाचा संस्कार ज्याच्यावर झालेला आहे असा.

**संवनन**–न., **वशीकरणम्** ( इन्दु, असंउ. ५० )
वशीकरण. वश करण्याचे साधन, मंत्र इत्यादींनी वश करणे.

**संवरण**–(परिव०) न., **आच्छादनम्** ( असंशा. ४.३१; सुउ. ३९.२८६ )
आच्छादन.
**संकोचः**(सुशा.३.९)संकोच,आकसणे.आकुंचित होणे.

**(संवरणी)**–स्त्री., पेशी० **गुदस्य बाह्ये भागे स्थितानां तिसृणां मध्ये मलस्य संवरणात संवरणीत्याख्या प्रथमा वली** ( सुनि. २.५; असंनि. ७.५ )
गुदाची एक वळी. गुदाच्या बाह्यभागात असलेल्या तीन वळ्यांपैकी पहिली वळी. मळाचे संवरण आच्छादन करणारी. गुदद्वाराचे आकुंचन करणारी.

**संवर्तक**–पु., **वनस्पति० बिभीतकः** ( चक्र. चचि. ३.२५८; ध. १.२१२; पृ. ५० )
बेहडा.

**संवर्धनघृत**–न., **घृत० खदिरपृश्निपर्णीस्यन्दनसैन्धवबलाद्वयादिद्रव्याणां कषायैस्तुल्यक्षीरयुतैः सिद्धं मधुयुतं घृतं बालानां शीघ्रसंवर्धनम्** ( का.सू.लेहाध्याय. )

बालकाची वाढ करणारे तूप. खैर, पिठवण, तिवस, सैंधव, चिकणा ( दोन्ही ) इत्यादी औषधींचा एक चतुर्थांश काढा. त्यात तितकेच दूध घालून त्यांत तूप सिद्ध करून मध घालून द्यावे. मुलांची शीघ्रतेने वाढ करते.

**संवासित**–वि., **मिश्रीकृतः** ( ड. सुउ. २२.७ )
मिश्रीकृत, मिसळलेले.

**संवाहक**–वि., **संवाहयति नाम शरीरमर्दनादि करोति, सः, ( परिचारकः )** ( चसू. १५.७ )
शरीर चोळतो, चेपतो तो परिचारक.

( **संवाहिका** )–स्त्री., **कीट० पिपीलिकाभेदः, एतस्या दंशे श्वयथुरग्निस्पर्शवद्दाहौ भवतः** ( सुक. ८.३४ )
मुंगीच्या वर्गातील एक किडा. याने दंश केला असता सूज व विस्तवाची ठिणगी लागल्या सारखी आग होते.

**संवाहन**–न., **उपक्रम० मृदुमर्दनम्** ( सुशा. ४.४३; असंसू. ९.६४ )
हलु हलु अंग चेपणे–रगडणे.
**सुखकरः स्पर्शः** ( ड. सुक. ५.३८ )
गोड वाटणारा स्पर्श. सुखदायक स्पर्श.

**संवाहिनी**–स्त्री., **शारीर० नाडी, वाहिनी** (चशा. ४.१५)
वाहिनी ( रस रक्त इत्यादींची ).

**संविधान**–न. **चिकित्सा** ( सुचि. ३४.५ )
**कर्म** ( ड. सुक. २३.८ ) उपचार कर्म.
**परिच्छदः, सामग्री** ( सुचि. ९.६ ) साधनसामुग्री.
**–वत्**–वि., **चिकित्सोपयोगिसामग्रीयुक्तः, परिच्छदवान्** ( सुचि. ९.६ )
उपचारांना उपयोगी अशा साधनसामुग्रीने युक्त. साधनसंपन्न.

**संविभक्त**–वि., **विभज्य कर्मणि नियोजितः** ( ड. सुक. १.१४-१६ )
योग्यतेप्रमाणे कामावर योजलेली योग्य व्यक्ति.

**संविभागरुचिता**–स्त्री., **सात्विगुण० संविभज्य परस्परं भोज्यादिवितरणेन भोक्तुमभिलाषुकता** ( ड. सुशा. १.१८ )
इतरांना योग्य ते अन्न वाढून नंतर आपण अन्नग्रहण करण्याची इच्छा असणे.

**संविभागिन्**–वि., **सम्यक् फलविभजनशीलः** ( चशा. ४.३७(१)
संपत्तीची योग्य वाटणी करण्याचा स्वभाव असलेला. योग्य श्रेय दुसऱ्यांना देण्याच्या वृत्तीचा.

**समीभूतदृष्टिकः** ( असंसू. ३.८४ )
समदृष्टी. समत्वदर्शी.

**संवीत**–वि., **आच्छादितम्** ( सुउ. ३९.२९१ )
आच्छादलेला. कपडे घातलेला. वेष्टिलेला.

**संवीताङ्ग**–वि., **आच्छादिताङ्गः** ( असंसू. ३.४ )
झाकलेल्या अंगाचा. कपडे केलेला. पांघरूण घेतलेला.

**संवृत**–वि., **आच्छादितः** ( सुचि. २४.१२४ )
आच्छदलेला, आवरण असलेला.
पु., **वनस्पति० वेतसः** ( ध. ५.११७ ) वेत.
**–कोष्ठ**–वि., **वायुनाऽल्पीकृतकोष्ठः, वायुव्याप्तकोष्ठः** ( चसि. २.८; असंसू. २७.७ )
वाताने ज्याचा कोठा व्याप्त केला आहे असा. उदरभाग प्रमाणापेक्षा लहान असलेला. वाताने दुष्ट कोठा असलेला.
**–मुख**–वि., **आच्छादिताननः** ( असंसू. ३.९४ )
झाकलेल्या तोंडाचा.
**–योनि**–स्त्री., **लक्षण० संकुचिता योनिः** ( चचि. ३०.४४; असंसू. ९.७० )
संकुचित योनि. आकुंचित योनि.
**–व्रण**–पु., **आच्छादितः संकुचितो वा व्रणः** ( चचि. २५.२० )
संकुचित व्रण, झाकलेला व्रण.

**संवृतायन**–वि., **संवृतानि इन्द्रियरूपाणि छिद्राणि यस्य सः ( आत्मा )** ( चशा. ५.१५ )
झाकलेली इंद्रियरूप छिद्रे ज्याची तो आत्मा.

**संवृतासंवृत**–वि., **अग्रे संवृतं मूलेऽसंवृतम् ( सिरादि )** ( चवि. ५.९; असंशा. ६.५० )
शिरांपैकी काही मुळात खुल्या ( मोकळ्या ) व पुढे झाकलेल्या अशा शिरांचे नाव.

**संवृत्ति**–स्त्री., **निष्पत्तिः** ( चइ. १२.५६ )
निष्पत्ती, उत्पत्ती.

**संवेजन**–न., **उद्वेजनम् भयहेत्वादिना त्रासनम्** ( चचि. ९.२९ )
उद्विग्न होणे, भयादिकांनी त्रस्त होणे.
**कम्पनम्** ( सुचि. ३६.२६ ) कापणे, थरकाप.

**संवेशक**–वि., **शयने सहायकः, निद्रापकः ( परिचारकः )** ( चसू. १५.७ )
सोबतीला झोपणारा. ( नोकर )

**संवेशन**–न., **विस्रवणम्** ( ड. सुसू. १९.११ )
मैथुन, मूत्रपुरीषोत्सर्जन.

( परिव० ) एकत्र संस्थितिः ( सुउ. ६०.६१ )
एकत्र येणे–राहणे. एक ठिकाणी बसणे.
( परिव० ) शयनम् ( सुचि. २९.११ )
झोपणे.

**संव्यूढ**–वि., **बन्धान्मुक्तम्** ( असंउ. ३२ )
बंधनापासून मुक्त.

**–पिटिका**–स्त्री., **गुह्यरोग० संमूढपिटिका** (असंउ. ३८)
एका पुळीचे नाव. गुप्तभागातील रोग.

**संव्यूहन**–न., **यन्त्रकर्म० एकत्रीकरणम्**
( अहृसू. २५.४१ $\frac{1}{2}$ )
यंत्राचे कर्म. एकत्र करणे.

**संव्यूहिम**–वि., **संहतत्वेन पक्वतीक्ष्णः ( क्षारः )**
( सुसू. ११.१२ )
क्षारविधीने केलेला क्षार, ज्यात चुनखडी इत्यादी द्रव्ये घालायची असतात तो क्षार.

**संशमन**–वि., **व्याधिनिग्रहहेतुष्वेकः, दोषशमनम्** ( सुसू. १.२७ ) **शमनकरं स्नेहादि** (चसू. १३.६१) **यद्द्रव्यं न वामयति, न विरेचयति, व्याधिना सहैकीभूय तत्स्थमेव व्याधिमुपशमयति तत्** ( सुसू. ३६.६ ) **सम्यक् शमयतीति संशमनम्, सम्यक्त्वं नाम दुष्टदोषस्यानिर्हरणपूर्वकं शमनमदुष्टस्यानुदीरणं च** ( सुसू. ३९.७; असंसू. २३.६ )
रोगनाशक एक उपचार. दोषशामक शमन करणारे तेल-तूप इत्यादी स्नेह व इतर द्रव्ये. जे द्रव्य ओकारी किंवा रेच न करिता रोगाशी एकीभूत होऊन व्याधीला त्याच्या स्थानातच शमविते ते संशमन होय. सम्यक्त्व म्हणजे दुष्ट दोषांना शरिराबाहेर न काढता तेथेच शमविते व दुष्ट नसलेल्या दोषांना दुष्ट करीत नाही ते द्रव्य.
( परिव० ) न., **मन्दीकरणम्** ( ड. सुउ. ४०.६ )
मंद करणे, सौम्य करणे.

**संशमनीय**–वि., **संशमयितुं योग्यम् संशमनार्हम्**
( सुशा. १०.६७ )
शमन करण्यास योग्य.

**संशय**–पु., **तन्त्रयुक्ति० विशेषाकाङ्क्षानिर्धारितोभयविषयज्ञानम्** (चसि. १२.४३) **उभयहेतुदर्शनम्**
( सुउ. ६५.३२ )
विशेषाची जिज्ञासा असताना ( परस्पर विरुद्ध म्हणून ) अनिश्चित अशा उभयांचे ज्ञान म्हणजे संशय. दोन्ही ( विरुद्ध ) कारणांचे ज्ञान म्हणजे संशय. एका वस्तूच्या ठिकाणी अनेक विरुद्ध धर्म ग्रहण करणारे ज्ञान म्हणजे संशय.
(तर्कसंग्रह.) उदाहरणार्थ—हे झाडाचे खोड की माणूस असा ( मंद अंधकारात ) येणारा संशय.

**–प्राप्त**–वि., **मरणं भवति न वाऽनेनारिष्टेनेति संशयो यस्मिंस्तत् मरणरूपसंकटग्रस्तम्** ( चइ. ९.१५ )
जगण्याबद्दल संशय वाटणे. दिसणाऱ्या अरिष्ट चिन्हाने मरण येईल काय असा संशय उत्पन्न झालेला रोगी. मरणरूपी संकटाने ग्रासलेला.

**–सम**–वि., **अहेतुभेदः, यः संशयहेतुः स एव संशयच्छेदहेतुः । यथा–अयमायुर्वेदैकदेशमाह किं न्वयं चिकित्सकः स्यान्नवेति संशये परो ब्रूयात्–यस्मादयमायुर्वेदैकदेशमाह तस्माच्चिकित्सकोऽयमिति**
( चवि. ८.५७ )
एक हेत्वाभास. जो संशयाचे कारण तोच संशयनाशाचा कारण. उदा० हा ( वादी ) आयुर्वेदाच्या एकाच अंशाचे अध्ययन केलेल्या व्यक्तीबद्दल म्हणतो की हा वैद्य आहे की नाही ? यावर प्रतिवादी म्हणेल की ज्या अर्थी आयुर्वेदाच्या एका अंशाचे अध्ययन केलेला ( आयुर्वेदैकदेश ) आहे त्या अर्थी हा वैद्य आहे. पण आयुर्वेदातले कोणी काही ऐकूनही बोलू शकतो यावरून हे कारण खरे नाही, ते अहेतु आहे.

**संशुद्ध**–वि., **शुद्धः, सुविरिक्तः** ( अहृसू. १९.४ )
शुद्ध. दोष काढलेला. सम्यक्–योग्य शुद्धि झालेला. योग्य प्रमाणात रेचक लागू झालेला.

**संशुद्धि**–स्त्री., **संशोधनम्** ( अहृसू. २.९ )
चांगली–योग्य शुद्धि, शरिरातील दोषांचे योग्य प्रमाणात शोधन–शुद्धि करणे.

**–विशेषणीय**–वि., **अध्याय०** ( काखिल. ७ )
शोधनचिकित्सेतील काही विशेष गोष्टी यात सांगितल्या आहेत.

**संशुष्करुधिर**–वि., **संशुष्कं नाम क्षीणं रुधिरं यस्य सः**
( चसू. १३.४७ )
ज्याचे रक्त क्षीण झाले आहे असा, रक्तक्षीण.

**संशुष्करेतस्**–वि., **संशुष्कं नाम क्षीणं रेतो यस्य सः**
( चसू. १३.४७ )
ज्याचे शुक्र क्षीण झाले आहे असा शुक्रक्षीण.

**संशोधन**–न., **उपक्रम० व्याधिनिग्रहहेतुष्वेकः, दोषशोधनम्** ( चसू. १३.७; सुसू. १.२७ )
**वमनविरेचनबस्त्यादिपंचप्रकारकम्** (सुसू. १५.१२)
**द्र० 'शोधन'**

रोगहरणाच्या कारणांपैकी एक, एक रोगहारक उपचार, शरिरातील दोष बाहेर काढून शरीर शुद्ध करणारा. दोषांचे शोधन करणे, वामक, रेचक, बस्ति इत्यादी पाच प्रकारचे उपचार.

**–काल**–पु., **वमनविरेचनादिप्रदानसमयः** ( चवि. ७.४ )
वामक, रेचक इत्यादी देण्याचा काळ.

**–घृत**–न., **सिद्धस्नेह० अर्कोत्तमस्नुही जातिमूलहरिद्राद्वयकासीसादिभिः साधितं घृतम्, व्रणस्य पूयादिदोषनिर्हरणार्थमुपयुज्यमानमेतत्** ( सु. सू. १७.१८ )
एक औषधी तूप. रुई, त्रिधारी निवडुंग, जाईचे मूळ, हळद, दारूहळद, हिराकस इत्यादीनी तयार केलेले तूप. व्रणातील पू व दोष नाशाकरता योजतात.

**–वर्ति**–स्त्री., **कल्प० अजगन्धाऽजशृङ्गीगवाक्षीलाङ्गल्यादिभिर्निर्मिता व्रणसंशोधनी भैषज्यवर्तिः** ( सुसू. ३७. १३-१४ )
दोषांचे शोधन करणारी वात. तिळवण, मेढशिंगी, कवंडळ, कळलावी इत्यादींनी केलेली ही जखम शुध्द करणारी औषधी वात.

**–शील**–वि., **नित्यं संशोधनाभ्यासी** ( सुनि. ३.४ )
नेहमी योग्य वेळी शरीर शुध्द करण्याकरिता वामके रेचके इत्यादी घेणारा. वामक रेचक इत्यादिकांचा अभ्यासक, यांची सवय असलेला.

**–संशमनीय**–वि., **अध्यायसंज्ञा०** ( सुसू. ३९.१ )
अध्यायाचे नाव. यात दोषांची शुद्धि व शमन करण्याच्या दृष्टीने माहिती आहे.

**संशोधनार्ह**–वि., **संशोधनयोग्यः** ( अहसू. १४.१२ )
शुद्धि करण्याला योग्य. वामक रेचक इत्यादी ज्याला देता येईल असा. स्थूल, बलवान, पित्त व कफ अधिक, आमदोष, ज्वर, ओकारी, अतिसार असणारा, आणि हृदयरोगी हे सर्व संशोधनाला योग्य होत.

**संशोध्य**–वि., **शोधनार्हः, कर्तव्यशोधनः** ( अहसू. १६.५ )
ज्याची शरीरशुद्धि केली पाहिजे असा, रेचक इत्यादी ज्याला देता येईल असा.

**संशोष**–पु., **शुष्कत्वम्** ( अहसू. ११.२३ )
शोष, शुष्क होणे.

**संशोषण**–न., **शुष्कीकरणम्, रूक्षणम्** ( सुउ. ४१.४ )
सुकवणे, शुष्क करणे, रूक्ष करणे.



**संश्लिष्ट**–वि., **घट्टितम्, समासक्तम्** ( सुनि. १५.१३ )
स्वाभाविक स्थितीत पक्का जुळलेला सांधा ( कपालास्थीचा ).
वि., **दृढयोजितम्** ( **बन्धनम्** ) ( र. १०.५ )
घट्ट बांधलेले बंधन.

**संश्लेष**–पु., **अपृथक्त्वमेकत्वम्** ( सुसू. २४.११ )
पृथक्– निराळे नसणे, एक असणे, एकत्व.

**संसर्ग**–पु., **संयोगः–दोषाणां रसानां वा** ( चवि. १.८ )
दोषांचा संयोग, रसांचा संयोग.
**विषयसेवनम्** ( चशा. ३.३ )
संभोग, मैथुन.
**उपक्रम० अन्नसंसर्गः पेयादिः, तर्पणादिकम्** ( सुउ. ४९.१७ ) **पेयादिक्रमः** ( सुउ. ३९.१०२ )
एक उपचार. अन्नाचा तर्पण, पेया, यवागू इ० क्रमाने उपयोग करणे, पेयादि क्रम. पेज, अटवल इ० क्रमाने आहार घेऊन नेहमीच्या अन्नावर येणे.
**द्वयोर्दोषयोर्युगपत् प्रकोपः** ( चसू. १७.४२; सुचि. ३५.६ ) **द्वयोः प्रमाणाधिकयोः क्षीणयोर्वा दोषयोः संयोगो नामैकस्मिन्नधिष्ठाने मेलनम्** ( सुचि. ५.११; अहसू. १.१२ ) **दोषाणां षोढा संसर्गः** ( असंसू. १.३० )
दोन दोषांचा एकदम प्रकोप. प्रमाणापेक्षा अधिक किंवा क्षीण झालेल्या दोन दोषांचा एका स्थानात संयोग होणे. दोन दोषांचे असे संयोग म्हणजे संसर्ग. हे सहा होत.

**( संसर्गी )**–स्त्री., **उपक्रम० पेयादिक्रमः** (असंचि.२.३४)
एक उपचार. हलक्या अशा मंड, पेज इत्यादी अन्नापासून एकापेक्षा एक घट्ट व जड असे अन्न क्रमाने देणे व नेहमीच्या अन्नावर येणे.

**–ज**–वि., **द्वन्द्वजः** ( **ज्वरादिव्याधिः** ) (सुउ. ३९.६१)
दोषांच्या जोडीने उत्पन्न झालेला (ताप इत्यादी).
**देवादिद्रोहजनसंपर्काज्जायमानः** ( **रोगः** ) ( सुसू. २४.७ )
देवादिकांचा द्वेष व तो करणाऱ्या लोकांच्या सहवासामुळे होत असलेला (रोग).

**–पाचन**–न., **पेयादिक्रमपाचनम्** ( सुउ. ४२.१२६ )
पेयादि आहाराचे क्रमाने पाचन.

**–बलयोजन**–न., **संसर्गे दोषबलमवेक्ष्य भेषजद्रव्यप्रयोगः यथा वातकफज्वरे वातस्य बलवत्त्वे गुरूष्णस्निग्धादिद्रव्यस्य, कफस्य बलवत्त्वे च लघूष्णरूक्षादिद्रव्याणां योजनम्** ( चचि. ३.२७१ )

दोषांच्या जोडीने उत्पन्न झालेल्या रोगात, त्यांचे बळ पाहून तदनुरूप औषधांची योजना करणे, जसे वातकफ ज्वरात वात जर बलवान असेल तर जड उष्ण स्निग्ध इत्यादी द्रव्यांचा व कफाचे बळ अधिक असेल तर हलके, उष्ण, रूक्ष इत्यादी गुणांच्या द्रव्यांची योजना.

**–भक्तक्रम**–पु., **पेयादिक्रमः** ( ड. सुउ. ५६.२३ ) पेया, विलेपी, या क्रमाने आहार देणे.

**संसर्जन**–न., **पेयादिक्रमः** ( चसू. १६.२६ ) पेज, अटवल इ० क्रमाने आहार देणे.

**संमिश्रणम्** ( चसू. १८.६ ) मिश्रण.

**संसर्पण**–( परिव० ) न., **बालस्य भूमौ परिसर्पणम्** ( का.संबाल. ) बालकाचे जमिनीवर सरपटणे. हात व पोट यावर मूल सरकणे.

**संसार**–पु., **वनस्पति० खदिरभेदः, विट्खदिरः** ( रा. ८.३८; पृ.१२ ) द्र० ' **खदिर** ' खैराचा प्रकार, शेण्या खैर. पहा ' खदिर '.

**संसृज्यमान**–वि., **संयुज्यमानः** ( सुशा. ३.४ ) दुसऱ्याशी संयोग पावणारा. संयुक्त होत असलेला.

**संसृष्ट**–वि., **एकीकृतः** ( सुउ. ३९.२०१ ) एक झालेला. एकमेकात मिसळलेले. एकीकरण झालेले.

**कृतसंसर्जनक्रमः, कृततर्पणादिक्रमः** (सुउ. ४७.६८) मंड, पेज इत्यादी क्रमाने आहार पचवून नेहमीच्या आहारावर आलेला.

**–भक्त**–वि., **आदौ कृतसंसर्जनः पश्चाच्च कृतभोजनः** ( चसि. १.२० ) प्रथम पेज इत्यादी क्रमाने आहार घेऊन शेवटी नेहमीच्या जेवणावर आलेला.

**–भोजन**–न., **कदशनभोजनम्** ( ड. सुनि. ९.१५ ) कदान्नाचे भोजन, निकृष्ट दर्जाचे अन्न खाणे.

**संसृष्टाहार**–पु., **तर्पणादिक्रमः** ( सुउ. ४७.६८ ) मंड, पेज इत्यादी आहाराचा क्रम. मंड, पेज इत्यादी क्रमाने नेहमीच्या आहारावर येणे. असा क्रमाने घेतलेला आहार.

**संस्कार**–पु., **गुणान्तराधानम्** ( चवि. १.२२(२) **दोषापनयनम्** (चक. १२.४८-४९) **संस्कारेण द्रव्याणां गुरुलघ्वादिगुणविपर्यासो भवति, यथा गुरूणां व्रीहीणां संस्काराल्लाजानां लघुत्वं तथा लघूनां सक्तूनां संस्कारात् सिद्धपिण्डिकानां गुरुत्वम्** ( चसू. २७.३३९ ) अन्नावर करावयाचा संस्कार. मूळच्या गुणात बदल करून निराळे गुण निर्माण करणे, दोष घालवणे. संस्काराने द्रव्यातील जड हलका इत्यादी गुणांच्या उलट गुण निर्माण होतात. जड अशा तांदळाला भाजून लाह्या केल्या की त्या हलक्या होतात व त्याचेच दाबून कांडून पोहे केले की ते अधिक जड होतात. हलके सातूचे पीठ जर पाण्यात कालवून घट्ट गोळा करून खाल्ले तर ते जड होते.

**द्रव्यान्तरसंयोगजनितं गुणान्तरम्** (चसू. १३.१३; हे. अहसू. ५.५६ ) दुसऱ्या पदार्थाशी संयोग केल्याने निर्माण झालेले भिन्न गुण.

**कारणम्** ( चक. चसू.११.३५ ) कारण.

**रससंस्कारः, स च स्वेदनमर्दनमूर्च्छनोत्थापनादिभेदादष्टादशविधः** ( र. ११.११ ) पाऱ्यावरचे अठरा संस्कार. स्वेदन, मर्दन, मूर्च्छन, इत्यादी.

**–वाह**–वि., **क्लीब० बस्तिवाजीकरणादिना यस्य शुक्रमदुष्टद्वारं सत् प्रवर्तते सः, अस्मिन्नासेक्यसौगन्धिककुम्भीकादयः क्लीबा अन्तर्भूताः** ( चक. चशा. २.१९ ) एक प्रकारचे नपुंसक, षंढ. शुक्रवर्धक औषधांनी किंवा त्या औषधीच्या बस्ती इत्यादींनी ज्याचे शुक्र पुष्ट होऊन व इंद्रियांचे द्वारही व्यवस्थित होऊन संभोग करू शकतो तो. असे आसेक्य सौगंधिक इत्यादी षंढ होत.

**–वाह्य**–वि., **क्लीब० संस्कारवाहः** ( असंशा. २.४० ) नपुसक. पहा ' संस्कारवाह. '

**–विरुद्ध**–वि., **संस्कारतो विरुद्धं यद्भोज्यादि तद्विषवत् यथा–एरण्डसीसकासक्तं शिखिमांसम्** ( चसू. २६.९२-९३ ) जे अन्न इत्यादी पदार्थ संस्कार केल्यानंतर शरिरात दोषोत्पादक होतात ते. प्रथम शरिरास उपकारक पण संस्कार केल्यानंतर जे उपद्रवी किंवा विषवत् होतात ते. मोराचे मांस स्वभावतः शरिराला उत्तम परिपोषक पण एरंडाच्या काडीवर भाजले व नंतर खाल्ले तर ते उपद्रवी, विरुद्ध.

**संस्कृत**–वि., **संस्कारयुक्तः संस्कारितः** (सुसू. ४६.३६१)
संस्कार केलेले. संस्कारयुक्त.

**संस्कृति**–स्त्री., **संस्कारः** ( र. १.७० ) संस्कार.

**संस्तम्भन**–न., उपक्रम० **संग्रहणम्** (ड.) **विबद्धत्वापादनम् ( दोषाणाम् )** ( सुउ. ४०.६८ )
एक उपचार. थांबविणारे, स्तंभक, अवरोध करणारे, दोष (मळ) बांधणारे, ग्राही.

**संस्तर**–पु., **दर्भाणां स्थण्डिलम् पिण्डस्थापनार्थं दर्भैः कृतो रचनाविशेषः** ( सुउ. ६०.१२ )
दर्भांचे रचलेले आंथरूण. दर्भ विशिष्ट पद्धतीने जमिनीवर आंथरून त्यावर पिंड ठेवतात, ते आंथरूण.

**–स्वेद्**–पु., उपक्रम० **स्वेदभेदः अष्टविधोष्मस्वेदेष्वेकः यथार्हस्वेदद्रव्याणि पिहितमुखायां कुम्भ्यां सम्यगुपस्वेद्य निवातशरणशयनकिलिञ्जे प्रस्तार्याविककौशेयवातहरपत्रान्यतमोत्तरप्रच्छदे कुथकाविकाजिनप्रावारादिष्ववच्छन्नं स्वेदयेदिति** ( असंसू. २६.९ ) द्र० ' **स्वेद** '
एक उपचार. घाम काढण्याचा एक प्रकार. उष्णतेने घाम काढण्याच्या आठ प्रकारांपैकी एक. दोषनाशक द्रव्ये भांड्यात घालून झाकण ठेवून, उकळून, निर्वात जागेत एका खाटेवर वातहर पाने वर ठेवून लोकरीचे किंवा रेशमी वस्त्र आंथरावे व कांबळे कातडे इत्यादी पांघरून रोग्याला निजवावे व खाली ते भांडे ठेवून वाफारा द्यावा.

**संस्तृत**–वि., **संव्याप्तम्, आच्छादितम्** ( असंसू. ६.२१ )
व्यापलेले, आच्छादलेले.

**संस्त्यान**–वि., **घनीभूतम्** ( चचि. २६.१०५ )
घट्ट झालेले.

**संस्थान**–न., **आकृतिराकारो वा** ( चक्र. चसू. १८.४२; सुसू. १२.१२; अहृसू. २५.१४ ) आकृति. आकार.
**लक्षणम्** ( चवि. ४.६; अहृसू. १२.६९; असंसू. २२.९ ) लक्षण. चिन्ह.
**रूपम्** ( चनि. १.९; असंनि. १.११ ) रूप. चिन्ह.
**स्थानम्** ( चचि. २६.१२२) स्थान.

**संस्थित**–वि., **सुस्थितम्** ( सुचि. ३०.१५ )
चांगले ठेवलेले, व्यवस्थित ठेवलेले.
**आकृतिमान्** ( सुचि. ३०.१५ ) आकृतीयुक्त.

**( संस्थिता )**–स्त्री., **आकृतिः** (सुचि.३०.१५) आकृती.

**संस्थिति**–स्त्री., **निर्गमरोधः** ( ड. सुचि. ३७.१२५ )
बाहेर जावयाचा पदार्थ बाहेर न जाता तेथेंच रहाणे. अडणे. ( गर्भाशयातील वार. )
**एकस्मिन्नैव स्थाने आसनं स्थितिर्वा** ( अहृसू. १६.२७ )
एकाच ठिकाणी असणे, बसणे.

**संस्पर्श**–पु., **स्पर्शसंबन्धः** ( चशा. ६.१८ )
स्पर्शाचा संबंध.

**संस्पर्शन**–वि., **संस्पृश्यते इति संस्पर्शनं यथा मुक्तादि** ( चनि. २.११ )
उपचार. स्पर्श करणे, मोती इत्यादिकांचा स्पर्श. अंगावर घालणे. ( रक्तपित्तरोगांत. )

**संस्पर्शनेन्द्रिय**–न., वि., **संस्पर्शनयुक्तं शरीरम्** ( चक्र. चशा. १.७९ )
स्पर्शनेंद्रिय असलेले शरीर. स्पर्शाचे ज्ञान करून घेणाऱ्या इंद्रियाची संज्ञा.

**संस्वेद्**–पु., लक्षण० **स्वेदाधिक्यम्** ( चसू. ३.२९; र. १२.१०१-१०३ ) घामाचे आधिक्य.

**–ज**–पु., प्राणि० **भुवः शरीरस्य च संस्वेदाज्जातः** ( सुसू. १.२२ )
जमीन व शरीर यांच्या आर्द्र उष्णतेने जन्मलेले.

**संस्वेदन**–न., **पारदसंस्कार० स्वेदनम् मलशैथिल्यकारकम्** ( र. २. ६७ )
पाऱ्याचा एक संस्कार. सांगितलेल्या वनस्पतीमध्ये पारा उकळणे. पाऱ्यातील मल शिथिल करणारे.

**संस्वेदिन्**–वि., **स्विन्नः प्रस्वेदयुक्तः** ( ड. सुउ. ६०.९ )
घामावलेला, घाम आलेला.

**संहत**–वि., **घनम्** ( सुसू. ३५.१६ ) घट्ट, कडक, भरीव.
पु., **रोग० शोथः** ( असंनि. १३.२४ ) सूज.

**संहताङ्ग**–वि., **गूढाङ्गः सच दीर्घायुः** ( सुसू. ३५.५ )
दृढ घट्ट पीळदार अवयवांचा हा दीर्घायुषी असतो.

**संहनन**–वि., **संधानकरो भग्नविश्लिष्टादीनाम्** ( सुसू. ४६.३५९-३६१ )
फुटलेले, भंगलेले, निखळलेले जोडणारा–सांधणारा.
न., **संघातो दृढता** (चवि. ८.सं.११६;सुनि.११.६) चांगल्या तऱ्हेने रचलेले, बळकट, सुबद्ध, घट्ट, पीळदार असणे ( मांस, स्नायु अवयव. ) एकमेकांशी घट्ट– संघटित.
**संयोजनम्, मेलकः** ( चसू. २१.१८ )
संयुक्त होणे, एकमेकात मिळून एकसंध असणे.

**संहर्ष**–पु., **स्पर्धा** (चवि. ८.१५१)
स्पर्धा, विशेष आनंद.
**रोमोद्गमः** ( सुसू. २६.१० )
रोमांच उभे राहणे.
**मनसः प्रसन्नत्वम्** ( सुनि. १०.२०-२१ )
मनाची प्रसन्नता.

( **संहर्षा** )–स्त्री., **मधुरस्कन्धोक्तवनस्पति० वन्दाकः** ( चक्र ) **वत्सादनी** ( चवि.८.१३९ )
वनस्पती. बांडगूळ.
**वनस्पति० जन्तुकारी** ( ध. ४.८८; पृ. १५१ )
माळव्यात या नावानेच उपलब्ध.

**संहर्षित**–वि., **स्पर्धावान्** ( ड. सुउ. ६२.११ )
स्पर्धा करणारा.

**संहित**–वि., **साधितम्, कृतसम्यक्संधानम्** ( सुचि. ३.७० )
सांधलेले, भंगलेले हाड सांधले जाणे. चांगले जुळवणे.
**–पुष्पिका**–स्त्री., **वनस्पति० मिश्रेया** ( रा. ४.६; पृ.६९ )
ताडाच्या पानासारख्या पानांची जमिनीकडे तोंड असलेल्या सुंदर फुलांची वनस्पती.

**संहिताकल्प**–पु., **अध्यायसंज्ञा०** ( काकसंहिताक. )
अध्यायाचे नाव.

**संहिताविधि**–पु., **संहितास्वरूपम्** ( का.संहिता क. )
संहितेचे स्वरूप.

**संहृष्टरोमन्**–वि., **लक्षण० उद्धर्षितरोमा, पुलकितः** ( ड. सुउ. ५९.६ )
रोमांच असलेला. ज्याचे केस उभे राहिले आहेत तो.

**स**–अव्य., **ईषत्** ( हे. अहसू. १.११ ) थोडे. अल्प.

**सकण्डूक**–पु., **रोग० कर्णपालीरोगः, कफवातजोऽयम्, तल्लक्षणम्–कर्णपाल्यां कण्डूर्भवति** (सुचि. २५.८; सुसू. १६.२६ ( ७-८ )
एक रोग. कानाच्या पाळीचा रोग. हा कफवातज आहे. या रोगात पाळीला खाज सुटते.

**सकल**–न., **वनस्पति० पद्मकन्दः** ( ध. ४.१६३; पृ. १६७ )
कमळाचा कांदा. कमळकंद.
**कत्तृणम्, रोहिषतृणम्** ( ध. १.८०; पृ. २१. र. ३०.४५ )
रोहिसगवत.

**सकुरुण्ड**–पु., **वनस्पति० साकुरुण्डः** ( रापरि. ६.१६; पृ. ३४६ )
कपड्याचा रंग होणारे एक गाठाळ फळ.

**सकृत्**–अव्य. **किञ्चित्** ( ड. सुनि. १६.८ )
किंचित, अगदी थोडे.
**एकवारम्** ( ड. सुचि. ३७.६४ ) एकदां. एक वेळ.
**–फला**–स्त्री., **वनस्पति० कदली** ( रा. ११.१०६; पृ. १४८ )
केळ.

( **सकृद्** )–**वीर**–पु., **वनस्पति० एकवीरः** ( रापरि. ८.८; पृ. ३५७ )
एक वीर नांवाची अर्धांगवात नाशक एक वनस्पती.

**सक्त**–वि., **बद्धम्** ( चवि. ८.९८ ) बांधलेले.
**लग्नम्** ( सुनि. १६.५८ ) लागलेले, चिकटलेले.
**–गति**–वि., **अविसारी अप्रसरणशीलम्** (चसू. १८.१३)
न पसरणारा, स्थिर.
**–मूत्र**–वि., **लक्षण० विबद्धमूत्रः** ( ड. सुउ. ४०.९ )
लघ्वी अडणे, मूत्रावरोध.
**–विष्**–वि., **लक्षण० विबद्धपुरीषः** (सुउ. ४०.१३०)
मलावरोध, शौचाला न होणारा.

**सक्ति**–स्त्री., **अप्रवर्तनम्** ( सुउ. ५५.२९ )
प्रवृत्ति न होणे–थांबणे. गति रोकणे.

**सक्तु**–पु., **वनस्पति० यवः** ( चसू. २३.२४; रा. १६.१२४; पृ. २२३ )
जव, सातू.
**आहारद्रव्य० यवतण्डुललाजादिचूर्णम्** ( चसू. २७.२६३ )
**भृष्टानां निस्तुषयवानां चूर्णं सक्तवः, तद्गुणाः– वातलोः रूक्षोः बहुवर्चोऽनुलोमी सद्यस्तर्पणः सद्योबलकरश्च** (चसू. २७.२६३; असंसू. ७.२२०)
**लघुः कण्ठनेत्रामयक्षुत्तृट्श्रमच्छर्दिव्रणापहः** ( असंसू. ७.६० )
**सतक्रघृतोऽयं पानेन विषनाशनः** (असंउ. ४७)
जव, तांदूळ, लाह्या इत्यादींचे पीठ. भाजलेल्या, तूस काढलेल्या जवाचे पीठ, सातूचे पीठ. **गुण**— रूक्ष, हलके, ताबडतोब शक्ति व उत्साह वाढविणारे, व तृप्ति करणारे, मळ वाढविणारे, गुदमार्गाने वात बाहेर घालविणारे, थकवा, तहान भूक कमी करणारे, घसा-डोळे यांचे रोग, ओकारी जखम नाहीसे करणारे व वातूळ आहे. ताक व तूप यांबरोबर प्याल्याने विषनाशक.

**-पिण्डिका**-स्त्री., सक्तुभिः कृता पिण्डिका व्रणशोफपाकार्थमुपयुक्ता ( चचि. २५.५० )
सातूच्या पिठाचा गोळा, लाडू, पिंड, गोळी. सूज पिकण्याकरिता उपयुक्त.

**-पिण्डि**-स्त्री., स्वेदादिसमये चक्षुषोराच्छादनोपयोगिनी ( असंसू. २६.२१ )
सातूची गोळी. घाम काढताना वाफ किंवा उष्णतेची धग डोळ्याला लागू नये म्हणून डोळे झाकण्याकरिता ही आच्छादन म्हणून उपयुक्त.

**-मन्थकल्प**-पु., योग० क्षुण्णान्यवान्निस्तुषान् रात्रौ गोमूत्रपर्युषितानहनि किलिञ्जे शोषयेदेवं सप्ताहं भावयेच्छोषयेच्च । ततस्तान्सक्तून्कृत्वा भल्लातकादिचूर्णे चतुर्भागयुक्तानसनादिकषायेण अयं पीतश्वेतत्कुष्ठहरः ( असंचि. २१ )
सातूचा असनादि काढ्याशी घेण्याचा कल्प. तूस काढलेले जव कांडून वरची साल काढून रात्रीं गोमूत्रात भिजवून दिवसा लाकडाच्या फळीवर सुकवावे. या प्रमाणे सात दिवस करून, त्याचे पीठ करावे बिब्बा इ० चूर्णात चार भाग घालून ते असाणा इ० काढ्याबरोबर प्यावे. म्हणजे कोड नाहीसे होते.

**सक्तुक**-न., कन्दविष० साक्तुकम् ( र. १०.८५ )
एक कंदविष. विषारी कंद.

**सक्थि**-न., शारीर० कटिसंधिमारभ्य पादाङ्गुलिं यावत् ( ड. सुसू. ३५.१२ ) गुल्फादिविटपान्तम् ( सुनि. १.७४ ) वङ्क्षणाद्यङ्गुष्ठान्तम् ( हे. अहसू. १२.१ ) जङ्घा ( ड. सुचि. १५.९ ) वातस्थानमिदम् ( चसू. २०.८; अहसू. १२.१ ) सङ्ख्यातः द्वे ( चशा. ७.५ )
एक शरीर अवयव. टांग, तंगडी, पाय. कंबरेच्या सांध्यापासून पायाच्या बोटांपर्यंत. सर्व अवयवाचा घोट्यापासून वृषणाच्या खालच्या शिवणीपर्यंतचा अवयव. जांघेच्या सांध्यापासून आंगठ्यापर्यंतचा अवयव. हे वाताचे स्थान आहे. ह्यांची संख्या-दोन.

**-शोष**-पु., ऊरुशुष्कत्वम् ( सुशा. ६.२४ )
टांग सुकणे-बारीक होणे. वाळणे.

**-सदन**-न., ऊरुग्लानिः ( सुशा. ३.१३ )
मांड्या गळणे.

**सख्य**-न., मैत्री ( सुसू. २९.६८-७१ )
मैत्री, स्नेह, दोस्ती,

**सगर**-पु., नृप० ( का. फक्कचि. ) एक राजा.
बिलेशय० दिव्यः सर्पः (असंउ. ४१) एक दिव्य सर्प.
न., खनिज० हिङ्गुलम् ( रा. १३.४७; पृ. २१५ )
हिंगूळ.

**सगोत्रा**-वि., समानं गोत्रं यस्याः सा, इयं व्यवाये प्रतिषिद्धा ( सुचि. २४.११६ )
एकाच गोत्राची, समान गोत्राची. ही स्त्री संभोगाला निषिद्ध, वर्ज्य.

**संकर**-पु., तृणादिचयः ( चक्र. चचि. ९.२० ) अवकरः ( सुनि. ७.१७ )
गवत इत्यादींचा लहानसा ढीग. पाला-पाचोळ्याचा लहानसा ढीग. केर, कचरा.
सर्ववर्णानां मिश्रीभावः ( सुसू. ३४.९ )
सर्व वर्णांचे मिश्रण. भिन्न वर्णांचे-जातींचे विवाहादी संबंध येऊन होणारे मिश्रण.
संमिश्रणम् ( असंशा. ८.१८ )
एकत्रावस्थानम् ( हे. अहसू. १.३२ )
मिश्रण, एकत्र असणे.

**-कूट**-पु., अवकरनिकरः ( इन्दु. असंउ. ६ )
कचऱ्याचा ढीग.

**-स्वेद**-पु., स्वेद० त्रयोदशस्वेदेष्वेकः ( चसू. १४.३९ ) अष्टविधोष्मस्वेदेष्वेकः पिण्डस्वेदः ( असंसू. २६.७ ) वस्त्रान्तरितैरवस्त्रान्तरितैर्वा यथोक्तैः पिण्डैरुपस्वेदनम् ( चसू. १४.४१ ) तद्विधिः-कपालपाषाणलोष्टलोहपिण्डानग्निवर्णान् संदंशेन गृहीत्वाऽम्भस्यम्ले वा निमज्जयेत् । तैरार्द्राविकवस्त्रेण वेष्टितैः श्लेष्ममेदोभूयिष्ठं सरुजमङ्गं ग्रन्थिमद्वा स्वेदयेत् । पांशुसिकतागवादिपुरीषधान्यबुसपुलाकपललैर्वाऽम्लोत्क्वथितैः पूर्ववद्वेष्टितैर्गवादिशकृताऽऽर्द्रेण पिण्डीकृतेनोपनाहद्रव्योत्कारिकाकृशरापायसपिण्डैर्वा स्वेदः । अयं वातरोगेषु शस्यते ( असंसू. २६.८ )
शेकविधि. घाम काढण्याचा एक प्रकार. तेरा शेकांपैकी एक. आठ उष्म शेकांपैकी एक. गोळा करून शेक. औषधांचा कपड्यात चेंडूसारखा गोळा किंवा कपड्यावाचून औषधांचा गोळा करून शेकणे. त्याचा विधि-खापर, दगड, ढेकूळ, लोखंडाचा गोळा विस्तवासारखा लाल तापवून चिमट्यात धरून तो पाण्यात किंवाआंबट द्रवात बुडवावा. ते गोळे ओल्या लोकरीच्या कपड्यात गुंडाळून, त्यांनी शेकावे, कफ मेद विकार अधिक असून त्यात

वेदना असल्यास किंवा गाठी असल्यास असे शेकावे. धूळ, वाळू, गाय इत्यादींचे शेण, धान्याचा कोंडा, भात, मांस हीं आंबट द्रवात शिजवून पहिल्याप्रमाणे लोकरीच्या कापडात पुरचुंडी करून त्याने किंवा शेकण्याच्या द्रव्याच्या गोळ्याने, हारोळी, खिचडी, खिरीचा गोळा याने शेकावे हे असे वातरोगात योग्य.

**संकल्प**–पु., **प्रतिपन्नानां भावानामुपकारकं ममेदमपकारकं ममेदमिति गुणतो दोषतो वा कल्पनम्** ( चक्र. चसू. ८.५ )
उपलब्ध वस्तूपैकी हे मला उपकारक, हे मला अपकारक असे गुणदोष दृष्ट्या ठरवणे.
**कामः** ( चचि. १५.३४; असंसू. ९.६९ ) **अयं वृष्याणां श्रेष्ठः** ( चसू. २५.४०; असंसू. १३.३ )
कामवासना. ही उत्तेजित होणे ही गोष्ट शुक्रधातूला, त्याच्या संभोगादि कार्याला हितकर असलेल्या इतर गोष्टीपेक्षा श्रेष्ठ आहे.

**–प्रवण**–वि., **कामप्रवणः, विषयचिन्तनपरः** ( चचि. ३०.१५५-१५६ )
विषयाच्या विचारात असलेला, कामातुर, संभोगोत्सुक.

**संकल्प्य**–वि., **मनोविषयाणामेकः गुणवत्तया दोषवत्तया वाऽवधारणविषयभूतम्** ( चशा. १.२० )
मनाच्या विषयांपैकी एक. गुणाच्या वा दोषाच्या दृष्टीने समजून घेण्याचा विषय.

**संकीर्ण**–वि., **विरुद्धवीर्यम्** ( चसू. १३.६० )
विरुद्ध वीर्याचे.
**संकुचितम्** ( अहृसू. ७.६९ ) संकुचित ( योनि ).
**संमिश्रितम्** ( सुसू. ४६.४४६ )
संमिश्र, मिसळलेले.

**–भोजन**–न., **घृणास्पदमलादिमिश्रितव्यञ्जनादिभोजनम्** ( चक्र. चवि. ७.१२ )
मलादिमिश्रित तोंडी लावणी, चटण्या, कोशिंबिरी इत्यादींचे शिसारी येईल असे जेवण.
**विरुद्धाहारः** ( चक्र. चसू. १७.२७ )
विरोधी आहार.

**–रोमन्**–वि., **घनरोमा** ( ड. सुनि. १२.७ )
दाट केसांचा.

**संकीर्णाशन**–न., **संमिश्रभोजनम्** ( असंनि. १.१९ )
मिश्रभोजन. पहा ' संकीर्णभोजन. '

**संकील**–पु., **मूढगर्भ० कीलः** ( मानि. मूढगर्भ. )
अडलेल्या गर्भाचा प्रकार.

**संकुचित**–वि., **संकुचितगात्रः** ( चसि. १.३२ )
आकुंचित गात्राचा. आखडलेल्या अवयवांचा.

**संकुल**–वि., **मिश्रीभूतम्** ( सुउ. ७.१४ )
मिसळलेले, मिश्रित.

**संकोच**–पु., **आकुञ्चनम्** ( चसू. २८.२१ ) **अप्रसार्यत्वम्** ( हे. अहृसू. १२.५० )
आकुंचन. आकसणे. आखूड होणे.
**लक्षण० अवयवाकुञ्चनम्** ( चसू. १४.२४; चचि. २८.२० )
अवयव आकुंचित होणे.
**गोलकः पिण्डः** ( र. २०.११-१३ ) गोळा, पिंड.
न., **भैषज्य० कुङ्कुमम्** ( चचि. २.(३).२८; ध. ३.१२; पृ. ९५ )
केशर.

**संकोचन**–न., **संकोचः** ( सुचि. ५.६ )
आकुंचन, आखूड होणे.

( **संकोचनी** )–स्त्री., **वनस्पति० लज्जालुः** ( रा. ५.१५९;पृ. १५५ )
लाजाळू.

**संकोथ**–पु., **पूतिभावः** ( चसू. १७.१११; असंशा. ११.१९ )
कुजणे. कूज.

**संक्रामकरोग**–पु., **संक्रमको व्याधिः संसर्गसंभवो व्याधिः, कुष्ठज्वरशोषनेत्राभिष्यन्दास्तथा औपसर्गिकाः शीतलिकामसूर्यादयश्च रोगाः** ( सुनि. ५.३४ )
एकाचा दुसऱ्याला होणारा रोग. रोगी व निरोगी यांचा एकमेकांचा संपर्क झाल्याने होणारा रोग. कुष्ठ, ज्वर, क्षय, डोळे येणे तसेच उपसर्गाने होणारे देवी, गोवर इत्यादी रोग.

**संक्लिन्न**–वि., **सम्यगार्द्रीभावमापन्नम्** ( सुसू. ४६.४९६-४९७ )
चांगले ओले झालेले. ओले, आर्द्र.

**संक्लिष्ट**–वि., **दुष्टम्** ( सुचि. १.३१-३२ ) दुष्ट, दूषित.

**–कर्मन्**–वि., **पतितः, निन्द्यकर्मकृत्** ( चशा. १.१०६ )
निंद्य कर्मे करणारा.

**संक्षय**–पु., **नाशः** ( चसि. ९.३४ ) नाश.

**संक्षिप्त**–वि., **सूक्ष्मम्** ( **क्षतम्** ) ( ड. सुक. ४.१६ )
लहान, बारीक (क्षत) जखम.
**अल्पम्** ( सुसू. ३२.३ ) थोडे,

पु., **रोग०** **शुष्कशष्कुलिरुत्सन्नपालिरितरालपपालिः** ( सुसू. १६.१० )

कानाचा एक रोग. कानाची वाळलेली पाळी, एक उंच झालेली पाळी, एक आखूड झालेली पाळी.

**बन्ध०** **पञ्चदशकर्णबन्धेष्वेकः** ( सुसू. १६.१० ) बान्धपट्टी. कानाला बांधावयाच्या पंधरा पट्ट्यांच्या प्रकारांपैकी एक प्रकार.

**संक्षेप**–पु., **सम्यक्प्रेरणम्** ( सुचि. ३.१८ ) चांगली प्रेरणा. व्यवस्थित गति.

**आकुञ्चनम्** ( सुचि. ३.१८ ) आकुंचन.

**संक्षोभ**–पु., **संचलनम्** ( सुनि. १५.१५ ) **अत्यर्थचलनम्** ( सुउ. ४८.४ )

संधीचे अधिक चलन वलन. अतिशय हालचाल.

**संक्षोभण**–न., **चलनम्** ( सुचि. २३.४ )

नादुरुस्त वाहनातून गेल्याने शरीर खिळखिळे होणे.

**संक्षोभियानयान**–न., **विक्षोभकयानेन वाहनेन मार्गाक्रमणम्** ( असंशा. २.६० )

आदळत्या आपटत्या वाहनातून प्रवास करणे.

**संख्या**–स्त्री., **गणितम् यथा एकद्वित्र्यादि** ( चसू. २६.२९ )

गणित. गणना. जसे एक, दोन, तीन इत्यादी अंक.

**संप्राप्तिभेदः, यथा–अष्टौ ज्वराः पञ्च गुल्माः इत्यादि** (चनि. १.१२(१); असंनि. १.१४ )

संप्राप्तीचा प्रकार–जसे आठ ज्वर पांच गुल्म इत्यादी.

**क्रमः** ( सुउ. ६१.१६ )

अनुक्रम. एका मागून एक.

**ज्ञानम्** ( चक्र. ( चशा. ६.१० ) ज्ञान.

**–सामर्थ्यकर**–वि., **अभ्यासेन, बहुवारं सेवनेन कार्यकरः संख्या ज्ञानं गणना वा, तत्र सामर्थ्यं करोतीति संख्यासामर्थ्यकरः** ( चक्र. चशा. ६.१० ) पुष्कळ वेळा किंवा सतत सेवन केलेल्या गुणधर्मांच्या द्रव्यांनी त्या गुणांचा परिपोष होऊन विरुद्ध गुणांचा न्हास होण्याचे कार्य घडते हे संख्यासामर्थ्याचे उदाहरण होय. संख्या ज्ञान गणना यांत बलवान.

**संख्याग्रसंभव**–वि., **संख्यापरिमाणसंभवम्** (चवि.७.८)

अग्र म्हणजे परिमाण. संख्येने मोजले जाणारे.

**संख्यातधर्म**–वि., **सम्यग्ज्ञातो मोक्षरूपो धर्मो येन, स ( तत्त्वज्ञः )** ( चशा. १.१५१ )

ज्याने मोक्षरूपी धर्म व्यवस्थित समजून घेतला आहे तो. तत्वज्ञ.

**संख्यातसंख्येय**–वि., **संख्यातं ज्ञातं ज्ञेयं येन सः ( सांख्यः )** ( चसू. १३.३ )

जे जाणावयाचे ते ज्याने जाणले आहे असा.

**संख्यान**–न., **परिगणनम् संख्यायते येन शरीरं तत् संख्या** ( चशा. ५.५ )

गणणे, मोजणे. संख्या. शरिराची गणना ज्या योगे होते ते.

**संख्यानप्रमाण**–न., **संख्यानस्येयत्ता, यथा–षट् त्वचः** ( चशा. ७.३ )

संख्येचे प्रमाण. संख्या किती ते. जसे– त्वचा सहा.

**संख्या च परिमाणं च** ( चशा. ७.३ )

संख्या व माप ( शेर, मण इत्यादी. )

**संख्येय**–वि., **गणानीयम्** (सुशा. ५.५)

गणण्यासारखे, गण्य, गणनीय, मोजण्यासारखे.

**संग**–पु., **सक्तिः, प्रसज्जनम्** (चसू. २०.१२; सुउ. ५८.८)

**अप्रवृत्तिः** ( चसू. २८.२२ ) **अवरोधः** ( चसि. ६.५९; सुउ. ४२.९ ) **बहिर्निःसरणम्** ( अहृसू. ११.२५ )

अडकणे, रोकले जाणे. अवरोध, प्रवृत्ति नसणे, प्रतिबंध, बाहेर न जाणे.

**विस्तृतानामेकत्रानयनम्** ( असंसू. २०.२० )

विखुरलेले एकत्र करणे.

**अपवर्गेतरफलदमनोवाक्कायकर्म** ( चशा. ५.१० )

मोक्षांविरहीत इतर फळ देणारे मन व शरीर, वाणी, यांचे कर्म म्हणजे संग.

**( संगा )**–स्त्री., **खनिज०** **सौराष्ट्री** ( ध. ३.१०५; पृ. ११६ ) तुरटी.

**संगिनी**–स्त्री., **वनस्पति०** **वटभेदः, वटी** ( रा. ११.११६; पृ. १८४ ) **द्र०** ' वट ' वडाचा प्रकार, पहा 'वट'

**संग्रह**–पु., **बह्वर्थकवाक्यानामेकत्र संकलनम्** ( चवि. ८.३ ) " **विस्तरेणोपदिष्टानामर्थानां सूत्रभाष्ययोः । निबन्धो यः समासेन संग्रहं तं विदुर्बुधाः** " ( न्या. को. )

पुष्कळ अर्थ असलेल्या वाक्यांचा एकत्र संग्रह करणे. विस्ताराने सांगितलेल्या अर्थांची सूत्रे व भाष्य ही एकत्र करून ठेवतात त्याला बुद्धिमान लोक संग्रह असे म्हणतात.

**ग्रन्थ०** **अष्टाङ्गसंग्रहाख्यः संहिताग्रन्थः** ( चचि. २५.२६ )

एक ग्रंथ- अष्टांग संग्रह नावाचा संहिताग्रंथ.

**रोग० ग्रहणी** ( र. १६.६१ ) एक रोग. ग्रहणीचा एक प्रकार.

**–ग्रहणी**–स्त्री., **रोग० आमवातजेयम् । तल्लक्षणानि– अन्त्रकूजनमालस्यं शीतो घनः स्निग्ध आमयुक्तो बहुलः पिच्छिलो द्रवरूपश्च मलः सशब्दो मन्दवेदनो भवति । तथा दौर्बल्यं सदनं च भवति । पक्षान्मासाद्दशाहान्नित्यं वाऽप्येवं मलं मुञ्चति रुग्णः । किन्तु रात्रौ स एव शान्तिं गच्छति । दुर्विज्ञेया दुश्चिकित्स्या चिरकालानुबन्धिनी**

( मा. ग्रहणी; र. २७.११०-११२ ) द्र० **' ग्रहणी '**

संग्रहणी. एक रोग.—आम व वात यांपासून ही होते. आमयुक्त मोठ्या आकाराचा घट्ट बुळबुळीत शिवाय पातळसा थंड स्निग्ध शब्दयुक्त किंचित वेदनांनी युक्त असा मळ पडतो. आतड्यात आवाज होतो, तसेच आळस, दुबळेपणा, अंग गळणे असते. दहा पंधरा दिवसांनी महिन्याने किंवा नेहमी असा मळ पडतो. परंतु रात्री हा त्रास होत नाही. ही चिरकाळ टिकणारी समजण्यास कठीण व उपचारांनाही कठीण आहे. पहा ' ग्रहणी '.

**संग्रहण**–वि., **संगृह्यते वर्चोऽनेनेति संग्रहणम् नाम स्तम्भनम् स्तम्भनकृत्** ( चचि. १९.२५ )

मळाचे स्तंभन करणारे, थांबवणारे.

न., **विबद्धत्वम्** ( सुउ. ४०.२९-३० )

मळ बांधणे, मळ घट्ट करणे.

**संग्राहिन्**–वि., **स्तम्भनकृत्** ( अहृसू. ५.३६ )

स्तंभन करणारे, थांबवणारे.

पु., **वनस्पति० कुटजः** ( रा. ९.१९; पृ. ७१ )

कुडा.

**संघट्टन**–न., **संघर्षणम्** (चशा. ८.४२) **परस्पराभिघातः** ( इन्दुः, असंउ. १, )

संघर्षण. एकमेकांना घासणे. एकमेकावर आपटणे ( आवाज उत्पन्न करण्या करिता ).

**संघपुष्पा**–स्त्री., **वनस्पति० धातकी**

( रा. ६.१५९; पृ. ११४ )

धायटी.

**संघर्ष**–पु., **लक्षण० करकरिमा** ( ड. सुउ. ६.६ )

एकमेकांना घासल्यासारखी वेदना. खुपणे.

**(संघर्षा)**–स्त्री., **वनस्पति० अलक्तकः**

( रापरि, ६.१२; पृ. ३४६ )

अळिता.

**संघाटी**–स्त्री., **जीर्णवस्त्रम् भिक्षुप्रभृतेः** ( सुउ. ३३.६ ) **वस्त्रमिदं ग्रहचिकित्सायां धूपनोपयोगि** ( का. बालग्रहचि ).

जुने फाटके वस्त्र (संन्यासी, बौद्धभिक्षु इत्यादिकांचे.) हे बालग्रह– चिकित्सेमध्ये धुरी देण्यास उपयोगी.

**संघात**–पु., **संहननम्, निबिडसंधानम्**

( चक. चवि. ८.११६ )

एकमेकांशी घनिष्ट दृढ संयोग, एकमेकीत घट्ट चिकटणे, संयुक्तअसणें.

**समुदायः** ( सुसू. ४६.१०५ )

समुदाय, समूह. एकत्र गोळा होणे. कळप.

**उच्छ्रायः** ( सुसू. १७.३ )

संचयाने उंचावणे, त्वचादींमधील दोषांच्या संचयाने तो भाग उचलून आलेला, सुजलेला दिसणे.

**काठिन्यम्** ( सुसू. ४१.४ ( १ );

हे. अहृसू. १०.१२ )

कठिणता, कठिणपणा, टणकपणा.

**कलहः, घातनम्** ( असंसू. ८.६४ )

झगडा, भांडण, मारणे.

**रोग० तालुगतोऽयम्, मांससंघातः**

( सुचि. २२.५७; सुनि. १६.४० )

मांसाचा गोळा. टाळूच्या ठिकाणी असलेला.

**अस्थिसंधि० दृढसंयोगः, संख्यया ते चतुर्दश; गुल्फजानुवङ्क्षणेषु त्रयश्चैकस्मिन् सक्थ्नि, एवं शाखासु मिलित्वा द्वादश, त्रिके एकः शिरसि चैकः** ( सुशा. ५.१६ ) **परमते ते चाष्टादश, श्रोणिकाण्डमुपर्येकः, वक्षउपर्येकः, उदरोरःसंधाने चैकः, अंसकूटमुपर्येकश्च पूर्वोक्ताश्चतुर्दश च**

( ड. सुशा. ५.१७ )

हाडांच्या संधींचा प्रकार. घट्ट संयोग असलेला प्रकार. ते चौदा आहेत. घोटा, गुडघा जांघ यांमध्ये एकेक असे एका शाखेत तीन याप्रमाणे चार शाखांत मिळून बारा. माकड हाडात एक; डोक्यात एक असे चौदा. इतरांच्या मताने अठरा. ढुंगणाच्या वर एक, छातीच्यावर एक; पोट व छातीच्या संधीत एक; आणि खांद्यात एक; हे चार व वरचे चौदा असे अठरा.

**–चारिन्**–वि., **मिलित्वा संचरणशीलो हंसादिः, तत्र सङ्घातचारिणः प्लववर्गोक्ता हंससारसक्रौञ्चचक्र-**

**वाककुररकादम्बकारण्डवजीवञ्जीवकबकबलाका-श्वेतवारलप्रभृतयः** ( सुसू. ४६.१०५ )
कळपाने संचार करणारे हंस इत्यादी. संघाने जाणारे, पाण्यात पोहणारे हंस, तांबड्या डोक्याचा सारस, करकोचा, कुररपक्षी, कलहंस, लहान पांढरा हंस, चकोर, चक्रवाक, बगळा, त्याच्याच जातीचा आणखी एक पक्षी, वगैरे पक्षी.

**–पत्रिका**–स्त्री., **वनस्पति० शतपुष्पा** ( रा. ४.२; पृ. ६९ )
बडीशेप.

**–बलप्रवृत्त**–वि., **प्रहारशक्तिजात आधिभौतिको रोगः शस्त्रकृतव्यालकृतभेदेन स द्विविधः** (सुसू. २४.६)
आघात, प्रहार यांनी झालेला रोग. शस्त्राने व हिंस्र वाघ इ० च्या आक्रमणानी होणारे असे दोन प्रकार.

**–विधमन**–वि., **यः शोणित संघातं विधमति विनाशयति सः** ( चसू. २६.४३(३) )
संघाताचा नाशक, रक्तातील एकत्र असलेले घटक पृथक् करणारा ( तिखट रस ).

**–शूलवत्**–वि., **लक्षण० अष्ठीलावत्संहतवस्तुशूलयुक्तः, महाशूलयुक्तः** ( सुसू. ३३.१६ )
आठळी सारख्या घट्ट वस्तूने शूल व्हावा तशा मोठ्या शूलाने युक्त.

**( सच् )–छाक**–न., **वनस्पति० आर्द्रकम्** ( ध. २.८५; पृ. ८७ ) आले.

**सच्छिद्र**–वि., **छिद्रयुक्तम्, सान्तरम्** ( चशा. ६.२८ )
छिद्रयुक्त, अंतर युक्त.

**सजीवबन्ध**–पु., **पारदबन्ध० आदौ ताम्बूलीदलरसमर्दितः पश्चाद्वन्ध्याकर्कोटकीकन्दमध्ये प्रक्षिप्य संपुटितो बहिर्मृद्वस्त्राभ्यां संपुटितो भूमौ गजपुटेन पुटितोऽयं भस्मीभवति** ( र. ११.७६ )
पाऱ्याची एका प्रकाराने केलेली पूड, भस्म. विड्याच्या पानांच्या रसात पारा खलून वांझकर्टोलीच्या कांद्यात तो ठेवून तो कांदा बाहेरून मातकापडाने वेष्टून गजपुटात अग्नि द्यावा. पाऱ्याचे भस्म होते.

**सजीवभस्मन्**–न., **पारदस्य जारणासंस्कारं विना विना केवलं मर्दनादिसंस्कारैः शुद्धमात्रस्य च्छिन्नपक्षस्याग्निसहस्य यद्भस्म क्रियते तत् । किञ्चिद्व्याधिनाशनमेतन्न तु रसायनयोग्यम्** ( र. ११.११४ )
पाऱ्याचे एक प्रकारचे भस्म. पाऱ्यावर जारणसंस्कार केल्यावाचून केवळ मर्दनमूर्च्छनादि संस्कारांनी पारा अग्नि सहन करणारा झाला, उडून जात नाही असा असला की त्याचे केलेले भस्म. हे रोगनाशक होते, परंतु सर्व धातूंचे परिपोषण उत्तम सुधारण्यास उपयुक्त होत नाही.

**सज्जोपस्करभेषज**–वि., **सज्जानि प्रगुणान्युपस्कराणि यन्त्रशस्त्रादीनि भेषजानि च यस्य सः ( वैद्यः )** ( सुसू. ३४.१९ )
ज्याच्याजवळ उत्तम यंत्रशस्त्रादी सर्व उपकरणे व औषधे आहेत असा वैद्य.

**संचय**–पु., **स्वस्थानवृद्धिः चयः** ( सुसू. ६.११ )
दोषाची स्वतःच्या स्थानात वृद्धि म्हणजे चय.

**संचरण**–न., **संचारः, शरीरे वातादीनामितस्ततो गमनम्** ( सुसू. २१.२७ )
वातादिदोषांचा शरिरातील एका स्थानातून दुसऱ्या स्थानात संचार होणे.

**संचारिन्**–वि., **औपसर्गिकः, सांसर्गिकः, संसर्गजः** ( असंनि. १४.४४ )
संचार करणारे. संसर्गाने एकापासून दुसऱ्याला होणारे रोग.
**नेत्रत्वग्विकारादिः स्पर्शैकाहारादिनिमित्तः** ( असंनि. १४.४४ )
डोळ्याचे व त्वचेचे वगैरे विकार एकमेकांच्या स्पर्शाने, एकत्र आहारादी केल्याने होतात.
**अनियतस्थानः** ( इन्दु. असंउ. २५ )
अनिश्चित स्थान.

**( संचारिणी )**–स्त्री., **वनस्पति० हंसपादी** ( रा. ५.१६७; पृ. १५६ )
राजहंस.

**–फलद**–पु., **वनस्पति० बिल्वः** ( रा. ११.१३५; पृ. २७ )
बेल.

**संचितदोष**–पु., **अतिशयेन स्वस्थाने वृद्धिं गतो वातपित्तादिः ( अरु. ) वैषम्यं प्राप्तो वातादिः** ( अहसू. ४.२५ )
स्वतःच्या स्थानात अतिशय वाढलेले वातपित्तादी दोष. विषम झालेले दोष.

**संचूषण**–न., **रोगलक्षण० आकृष्यते इव वेदना** ( ड. सुउ. ४७.६७ )
चोखल्यासारखी–ओढल्याप्रमाणे होणारी वेदना.

**संजयन्ती**-स्त्री., नगर० **अस्याः पूर्वतः क्षितिप्रदेशे वल्मीकमूर्धसु श्वेतकापोती नाम वनस्पतिर्लभ्यते** ( सुचि. ३०.३४-३५ )
एक प्राचीन शहर. याच्या पूर्वेस वारुळांच्या वर श्वेत कापोती वनस्पती सापडते.

**संजात**-वि., **समुत्पन्नम्** ( असंसू. ७.२०९ )
उत्पन्न झालेले, जन्मलेले.

**-रस**-वि., **संपक्वमाम्रादि** ( असंसू. ७.२०९ )
रस उत्पन्न झालेले पिकलेले आंबे इत्यादी.

**-रुधिर**-वि., **समुत्पन्नरक्तो व्रणादिः** ( अहृसू. २९.५६ )
ज्यात रक्त आले आहे असे व्रण इ०

**-वेग**-वि., **समुद्भूता मलमूत्रादिवेगा यस्य सः** ( अहृसू. १९.४७ )
ज्याला मळमूत्र विसर्जनाचे वेग उत्पन्न झाले तो. जसे ज्याला शौचास लागले आहे असा.

**-सार**-वि., **संजातबलः** (चशा. ८.२६ )
बल उत्पन्न झालेला. धातु विशुद्धतर झालेला. स्थिरधातु उत्पन्न झालेला—असलेला.

**-सारत्व**-न., **समुत्पन्नस्थिरांशत्वम्** ( असंशा. ४.७ )
धातूचे स्थिरत्व. विशुद्धतरत्व, बल.

**संजीवन**-पु., योग० **लाक्षाहरेणुनलदप्रियङ्गुशिग्रुद्वययष्टिकपृथ्विकादिभिः साधितोऽयं योगोऽञ्जननस्य पानैः सर्वविषहरः** ( सुक. ५.७३-७५ )
एक विषहर योग. लाख, रेणुकबीज, वाळा, गव्हला, दोन्ही शेवगे, ज्येष्ठमध, बाफळी, इत्यादींचा योग अंजन, नस्य व पिणे यानी सर्व विषहर.

**योग० स्वयम्भूविहितोऽयम्, चन्दनकुङ्कुमकुष्ठकाङ्गीलाक्षाप्रियङ्गुमुस्तस्थौणेयशैलेयरोचनामदनप्लवश्रीवेष्टकविडङ्गैलादिभिः साधितोऽयमगदः पाननस्याञ्जनधूमालेपनधारणैर्विषसुप्तानां जीवनः कृत्याकार्मणकष्टादिग्रहपीडाहरो यशःप्रदो राजद्वारे जयावहः सर्वविषहरश्च** ( असंउ. ४० )
स्वयंभू ब्रह्मदेवाने सांगितलेला एक योग. चंदन, केशर, कुष्ठ, तुरटी, लाख, गव्हला, नागरमोथा, मोरशिखा, दगडफूल, गोरोचन, गेळफळ, उतरण, राळ, वावडिंग, इत्यादींनी युक्त हा विषनाशक आहे. पिणे, नाकात, डोळ्यात घालणे, धुरी, लेप, अंगावर धारण करणे, विषाने पीडित झोपलेल्याना जीवन देणारा कृत्या इत्यादी ग्रहपीडानाशक यशप्रद राजदरबारी जय मिळवून देणारा व सर्वविषहर.

**योग० पलमात्रं पारदं वरनागेन युक्तं त्रिंशद्वारं पातनायन्त्रे पातयेत् । पारदं मृतं दृष्ट्वा समभागेन राजावर्तभस्मना अष्टमांशेन त्रपुभस्मना च सह त्रिंशद्वारं निम्बदलरसेन मर्दयेत् । संशोष्य च वरकरण्डके स्थापयेत् । अयं सर्वमेहनाशनः क्षुद्बोधकरश्च** ( र. १७.७८-८२ )
एक योग. चार तोळे पारा वरनागात ( पोलाद व नीलांजन सुरमा यांचा मिश्र धातु ) मिसळून तीस वेळा पातनायंत्रात घालून पारा पतन करावा.

**( संजीवनी )**-स्त्री., **वनस्पति० रुदन्ती** ( रा. ५.१५; पृ. ३४१ )
रानहरबरा, रुद्रवन्ती.

**संज्ञा**-स्त्री., **शुद्धिः, भ्रान्तिराहित्यम्, संज्ञां नामग्रहणेन परीक्षेत** ( चवि. ४.८ )
शुद्धि, जाणीव. भ्रांतिविरहित असणे. वस्तु किंवा व्यक्ति ओळखता येते की नाही यावरून संज्ञा आहे की नाही याची परीक्षा करावी.
**स्मृतिः** ( चसू. १३.७४ )
स्मरण.
**संवेदना, सुखदुःखादिज्ञानम्** ( चनि. ८.८(३); सुउ. ६१.८ )
सुखदुःखादी ज्ञान.
**जागृतिः, मूर्च्छापगमनम्** ( चनि. ८.८(२)
जागे असणे, मूर्च्छा जाऊन शुद्धीवर येणे.
**अभिधानम्** ( चनि. २.३ ) नाव.

**-द्वर्ग**-वि., द्रव्यगण० **संज्ञास्थापनो गणः, स च कैडर्यहिङ्गुचोरकादिः** ( असंसू. १५.४७ )
संज्ञा निर्माण करणारा औषधीगण. कढीनिंब, हिंग, चोरओवा इत्यादी.

**-नाश**-पु., लक्षण० **संज्ञा षष्ठश्चेतनाधातुः चैतन्यनाशः** ( सुशा. ६.२० )
संज्ञानाश, ज्ञाननाश, शुद्धि जाणे, मूर्च्छा. संज्ञा म्हणजे सहावा चेतना धातु (आत्मज्ञान). चैतन्यनाश.

**-प्रकृत**-वि., **संज्ञाभिः कृतः, संज्ञितः, अभिहितः** ( चवि. ६.११ )
नांव ठेवलेला, नावाचा, नावाने ओळखला जाणारा—बोलला जाणारा.

**–वहस्रोतस्**–न., स्रोतो० **संज्ञाहेतुमनोवहस्रोतः** ( चसू. २४.२५ ) **मनोवहा धमनी** ( सुशा. ४.३३ ) **ते स्रोतसी द्वे " द्वाभ्यां प्रबुध्यते "** ( सुउ. ६१.८ )

संज्ञावाही स्रोतस. ज्ञानवाहिनी–धमनी. संज्ञेचे कारण जे मन त्याला वाहणारे–मनोवह स्रोतस. मनोवह धमनी. ही दोन स्रोतसे या दोहोंनी ज्ञान होते, जागा होतो.

**–वहानाडी**–स्त्री., **मनोवहा धमनी, सा च इन्द्रिय-गृहीतां संज्ञां जानाति** ( सुउ. ४६.६ )

संज्ञावाही नाडी. मनोवह धमनी. ती इंद्रियांनी घेतलेली संज्ञा वाहून नेते.

**–स्थापन**–वि., **संज्ञां ज्ञानं स्थापयति तत्** ( चसू. ४.८ ) **हिङ्गुकैटर्यारिमेदावचाचोरकवयस्था-गोलोमीजटिलापलंकषाशोकरोहिण्य इति दशेमानि संज्ञास्थापनानि द्रव्याणि** ( चसू. ४.१८ ( ४८ )

संज्ञा आणणारा औषधीगण. संज्ञा स्थापक गण. हिंग, कढीनिंब, किंवा घाणेरडा करंज शेण्या खैर, वेखंड,ओवा, ब्राह्मी, भूतकेशी, जटामांसी, गुग्गुळ, कुटकी, हीं दहा संज्ञास्थापक आहेत.

**सटिका**–स्त्री., वनस्पति० **गन्धपलाशः** ( रा. ६.८९; पृ. १९ )

कचोरा, एक प्रकार.

**सटी**–स्त्री., वनस्पति० **सठी** ( ध. १.६१; पृ. १८ )

कचोरा.

**सट्टक**–न., **दधि० लवङ्गव्योषखण्डैर्निर्मथ्य गालितं दधि, दाडिमजीरकादियुक्तं सस्नेहं दधि, तद्गुणाः– रोचनं दीपनं स्वर्यं वातपित्तघ्नं गुरु मृष्टतरं प्राण-वर्धनं च** ( सुसू. ४६.३९६-३९७; असंउ. ४९ )

संस्कार केलेले दही. लवंग, सुंठ, मिरी, पिंपळी, साखर, घालून घुसळून गाळलेले दही. डाळिंब, जिरे, इत्यादी युक्त साईसुद्धा दही. गुण– रुचि उत्पन्न करणारे अतिशय स्वादिष्ट अग्निदीपक. स्वराला हितकर. जीवनधर्म वाढविणारे. जड, वातपित्तनाशक.

**सठी**–स्त्री., वनस्पति० **तद्गुणाः–तिक्ताऽम्लोष्णा तीक्ष्णा लघुर्वक्त्रशोधनी कफहृत् सन्निपातज्वरव्रणकासघ्नी च** ( ध. १.६१; पृ. १८ )

हिं.—कचूर.

**म.—कचोरा.**

गु.—कचूरा.

बं.—कर्चूर.

ता.—कचूर.

फा.—जरंवाद.

कचोरा. **गुण**–कडु, आंबट, उष्ण, तीक्ष्ण, हलका, तोंड स्वच्छ करणारा, कफनाशक; सन्निपात–ज्वर–जखम–खोकला नाशक.

**सढी**–स्त्री., वनस्पति० **कर्चूरम्** ( ध. ३.९४; पृ. ११४ )

कचोरा.

**सण्डि**–स्त्री., **शूकधान्य० तद्गुणाः–कफपित्तहरा रूक्षा कषायमधुरा हिमा, वातला बद्धविण्मूत्रा लघु-र्लेखनात्मिका च** (असंसू. ७.१५ )

वरी, नाचणी या जातीचे एक धान्य. **गुण**–तुरट, गोड, रुक्ष, थंड, हलके, कफपित्तनाशक; मळ-मूत्रांचा अवरोध करणारे, दोष खरडून काढणारे व वातूळ.

**सत्**–वि., **अस्तीति लब्धात्मकम्, सत्ताविशिष्टम्** ( चशा. १.५९ )

न., **सत्तायुक्तं द्रव्यं गुणः कर्म वा** ( चवि. ८.५६ )

अस्तित्व असलेले, मिळू शकणारे. सत्तायुक्त असलेले, जातियुक्त असे द्रव्य गुण किंवा कर्म होय.

**–कार**–पु., **पूजा** ( ड. सुउ. ६०.५ )

पूजा, सत्कार, सुस्वागत.

**–तम**–वि., **अत्युत्तमः** ( सुचि. २९.२९ )

अत्युत्तम. सर्वांत चांगले.

**सतत**–अ., **निरन्तरम्**

निरंतर, सतत, नित्य, नेहमी.

**–ज्वर**–पु., रोग० **विषमज्वरभेदः** ( चचि. ३.३४ ) **तल्लक्षणम्– रक्तधात्वाश्रयो दोषः सप्रत्यनीको-ऽहोरात्रे द्वौ कालौ व्याधितं ज्वरयति । कालवृद्धि-क्षयाभ्यामसौ अहोरात्रे द्विकालमनुवर्तते** ( चचि. ३.३४; सुउ. ३९.५२ ) **आमाशयोऽस्य स्थानम्** ( का. खिल. १.३२ )

सतत ज्वर. विषम ज्वराचा – पाळीच्या तापाचा प्रकार. लक्षण– प्रायः रक्तधातूचा आश्रय करून दोष रात्री व दिवसा असा दोन्ही वेळ पाळीने ज्वर उत्पन्न करतो. या दोषांना काल हा प्रतिकार करतो

म्हणून प्रतिकारक कालात नसतो, अनुकूल कालात येतो. कालाला अनुसरून याची वृद्धि व क्षय होतो. याचे स्थान आमाशय होय.

**सततकज्वर**–पु., **रोग० ज्वरभेदः सततज्वरः** (चचि. ३.६१-६२; का. खिल. १.३२) सतत ज्वर. पहा, 'सतत ज्वर'.

**सतिनामन्**–पु., **वनस्पति० गोधूमः** ( ध. ६.९७; पृ. ९९७ ) गहू.

**सतीन**–पु., **शिम्बीधान्य० वर्तुलकलायः** ( चसि. ३.८; सुसू. ४६.३३; रा. १६.१६४; पृ. २२६ ) **सर्वप्राणिनां सामान्यतः पथ्योऽयम्** ( सुसू. २०.५ ) **मूर्च्छायां च हितः** ( सुउ. ४६.१६ ) शेंगाचे एक धान्य, वाटोळा वाटाणा. हा सर्वांना सामान्यतः पथ्यकर आहे. मूर्च्छेमध्ये हितकर आहे.

**( सतीना )**–स्त्री., **वनस्पति० मसूरिका** ( ध. ६.९५; पृ. १५७ ) मसूर.

**विष्णुक्रान्ता** ( ध. ४.११५; पृ. १५७ ) विष्णुक्रांता.

**–ज**–न., **शाक० वर्तुलकलायपत्रशाकम्, तद्गुणाः– ईषत्तिक्तं त्रिदोषघ्नं कटु नात्युष्णशीतं लघु, ग्राहि, कुष्ठघ्नं च** ( अहृसू. ६.७२; सुसू. ४६.२६६ ) शाकभाजी, वाटाण्याची पाने. गुण— थोडी कडु, तिखट, अति उष्ण नाही व थंड नाही, हलकी, मल बांधणारी, त्रिदोषनाशक, कुष्ठनाशक.

**–यूष**–पु., **मण्ड० वर्तुलकलाययूषः, अयं कफानुगे रक्तपित्ते भोजनार्थे हितः** ( सुउ. ४५.१६ ) वाटोळ्या वाटाण्याचा यूष–कट. हा कफयुक्त रक्तपित्तात जेवणाकरिता हितकर.

**सतीनक**–पु., **वनस्पति० कलायः** ( ध. ६.१०३; पृ. २२८ ) वाटाणा.

**सतुष**–वि., **तुषसहितम्** ( असंसू. ६.१४० ) तुषासह, कोंड्यासह.

**सत्तानिवृत्ति**–स्त्री., **आस्थानिवृत्तिः** ( चशा. ७.१८ ) आस्थानिवृत्ति, इच्छानिवृत्ति, अपेक्षानिवृत्ति.

**सत्य**–वि., **यथार्थः** ( चवि. ८.३८ ) जसे असेल तसे, वास्तविक.

**रागद्वेषशून्यः** ( चशा. ६.२८ ) इच्छाद्वेषविरहित.

पु., **वनस्पति० पिप्पलः** ( ध. ५.७९; पृ. १८५ ) पिंपळ.

न., **मिथ्याभाषणनिवृत्तिः** ( सुसू. ३४.१९-२० ) खरे बोलणे, खोटे न बोलणे.

**–कर्मन्**–पु., **वनस्पति० बिल्वः** (ध. १.१०७; पृ. २७) बेल.

**–नाम्नी**–स्त्री., **वनस्पति० आदित्यभक्ता** ( रा. ४.१४५; पृ. १५३ ) सूर्यभक्ता.

**–पर**–वि., **सत्यभाषणपरः** ( सुसू. ३४.१९-२० ) **अवितथवाक्** ( असंसू. ५.४६ ) खरे बोलणारा, सत्यवादी. निरर्थक न बोलणारा. सत्यवक्ता.

**सत्याभिसन्ध**–वि., **सत्यप्रियः** (चशा. ४.३७ (१)) सत्यप्रिय. खऱ्याचा चाहता.

**सत्र**–न., **यज्ञः** ( सुचि. २४.९८; अहृसू. २.४३ ) यज्ञ.

**सत्त्व**–न., **मनः** ( चसू. ८.४; अहृसू. १२.६७ ) **आत्मसंयोगाच्छरीरस्य प्रेरकं धारकं च, बलभेदेनैतत्प्रवरमध्यावरं चेति त्रिविधम् । ततः प्रवरमध्यावरसत्त्वाः पुरुषा भवन्ति । तत्र प्रवरसत्त्वाः सत्त्वसाराः, मध्यसत्त्वास्त्वपरानात्मन्युपनिधाय संस्तम्भयन्ति हीनसत्त्वास्तु सत्त्वबलं प्रति नोपस्तम्भयितुं शक्यन्ते** ( चवि. ८.११९ )

मन. आत्म्याशी संयुक्त होऊन शरिराचे धारण करून त्याला प्रेरणा देणारे. बलाच्या दृष्टीने उत्तम, मध्यम व हीन असे ते तीन प्रकारचे. म्हणून उत्तम बलवान मनाचा–मध्यम बलवान मनाचा व अबल–दुर्बल मनाचा अशा तीन प्रकारच्या व्यक्ती असतात. त्यात उत्तम बलवान मनाचे सत्वसार समजले जातात. मध्यम बलवान मनाच्या व्यक्तींना दुसऱ्या व्यक्ती तीव्र दुःख–तीव्र वेदना सहन करतात, हे पाहिल्यानंतर त्यांच्या ठिकाणी सहनशक्ति येते. पण दुर्बल मनाच्या व्यक्तींना स्वतःला दुसऱ्याचे पाहूनही सहन करण्याचे सामर्थ्य आणता येत नाही.

**प्रकृतेस्त्रिगुणेष्वेकः सत्त्वगुणः । अयं प्रीत्यात्मकः प्रकाशको लघुश्च** ( चसू. ८.५; सुशा. १.३ ) **अयं निद्राप्रबोधनः** ( सुशा. ४.३५ )

प्रकृतीच्या तीन गुणांपैकी एक सत्वगुण. हा ज्ञानाचा प्रकाशक प्रीतिरूप व लघु आहे. हा झोपेतून जागे होण्याचे कारण आहे.

**मनोभेदविशेषः शुद्धराजसतामसभेदात्सत्त्वं त्रिविधम्** (चचि. २४.६८; चशा. ४.३६ )
मनाचा एक विशेष प्रकार. शुद्ध, राजस व तामस यांपैकी शुद्ध मन.

**प्राणेष्वेकः "अग्निः सोमो वायुः सत्त्वं रजस्तमः पञ्चेन्द्रियाणि भूतात्मेति प्राणाः"** ( सुशा. ४.३ )
शरिरातील बारा प्राणांपैकी एक. वर बारा प्राण आहेत.

**मानसं बलम्** (हे. अहृसू. २९.१०) **तच्चाविकारेण परीक्षेत** ( चवि. ४.८ )
मनाचे बल, मानसिक बल, ते मनाला त्रस्त करणाऱ्या परिस्थितीत अविचल–स्थिर विकाररहित राहिल्याने ओळखावे.

**गवादिः पशुः प्राणी वा** ( सुउ. ५०.१९ )
गाय इत्यादी पशु किंवा प्राणी.

**सारः, क्षाराम्लद्रावकैः सहितं कोष्ठीमध्ये ध्मातस्य द्रव्यस्य बहिरागतः सारभागः सत्त्वम्** ( र. ८.३४ )
मोरचूद इत्यादी उपधातु किंवा इतर द्रव्यात क्षार अम्ले इत्यादी द्रावक पदार्थ घालून मुशीत फुंकले– म्हणजे भट्टीत अग्नि दिला की त्याचा जो सारभाग निघतो तो सत्व.

**कल्प० गुडूच्यादिसत्त्वम्, तद्विधिः–गुडूच्यास्त्वचं निर्हृत्य लघूनि शकलानि कृत्वा दृषदि पेषयेज्जले च मज्जयेत् । ततश्च तानि मन्थदण्डेन संमथ्य वस्त्रेणावगालयेत् । तत उपरितनं जलं त्यक्त्वा ऽऽतपे शोषयेत् । शुष्के सति पुनर्जलप्रक्षेप आविलजलत्यागः शोषणं च कार्यम् । एवं चतुःपञ्चवारं कृते सति श्वेतं सत्त्वं निर्याति । एवमन्यत्रापि सत्त्वस्य निर्हरणम् आचर्यम्** ( र. १८.१८६ )
औषधीचा एक कल्प–गुळवेल इत्यादीचे सत्व. त्याचा विधि–गुळवेलीची साल काढून टाकावी. नंतर वेलाचे लहान तुकडे करून दगडावर वाटावे. व पाण्यात घोळावे आणि रवीने घुसळून वस्त्राने ते पाणी गाळावे, गाळलेल्या पाण्यात ते काही वेळ स्थिर ठेवल्यानंतर खाली तळाशी साका राहतो, वरील पाणी काढून पाणी काढून टाकावे, ते काही सुकवून पुन्हा पाणी घालावे व साका खाली स्थिर झाल्यावर पाणी काढावे व साका सुकवावा असे चार पाच वेळा केल्यावर तो साका पांढरा होतो. तेच सत्त्व. असेच अन्य वनस्पतींचे सत्व काढावे.

**–करण**–वि., **सत्त्वं नाम मनःकरणं यस्य सः,** ( जीवः ) ( चशा. ४.८ )
मन ज्याचे करण आहे तो ( जीव )

**–ज**–वि., **मानसः** ( **भावादिः** ) **ते च मानसा भावाः शौचास्तिक्यवेदाभ्यासगुरुपूजनप्रियातिथित्वादयः** ( सुशा. ३.३३ )
मनाचे. मानस भाव इत्यादी. मानसभाव. पावित्र्य आस्तिक्य वृत्ति, वेदांचा अभ्यास, गुरुपूजा अतिथिसत्काराची आवड इत्यादी भाव.

**–परिप्लव**–पु., **सत्त्वस्य चञ्चलत्वम्, मनोविभ्रमः** ( चचि. ९.६ )
मनाचे चंचलत्व, मन भ्रमिष्ट होणे.

**–पातनकोष्ठी**–स्त्री., **रसादिखनिजानां सारनिष्कासनार्थं निर्मिता** ( र. ७.६ )
सत्व पाडण्याची कोठी. खनिज उपधातु इत्यादी खनिज द्रव्याचे सत्व काढण्याकरिता केलेली कोठी.

**–भेद्**–पु., **मनोभेदः** ( चशा. ४.३६ )
मनाचे भेद, मनाचे प्रकार.

**–वत्**–वि., **उत्तममनोबलः** ( **पुरुषः** ) **सत्त्वसारः, तल्लक्षणम्–असौ बुध्या मनोदृढीकृत्य पीडादिकं सहते** ( सुसू. ३५.३८ ) **व्यसनेऽप्यनाकुलः क्लेशसहिष्णुश्च भवति**
(सुसू. ३४.२१; असंशा. ८.३२; अहृसू. १.२९ )
सत्ववान, उत्तम बलवान मनाचा पुरुष. सत्वसार. त्याचे लक्षण—हा बुद्धीने मन बळकट–घट्ट करून पीडा इत्यादी सहन करतो. तो संकटातही व्याकुळ न होता क्लेश सहन करीत असतो.

**–वर्जित**–वि., **सत्त्वगुणरहितः** ( सुशा. ४.९७ )
सत्वगुणरहित.

**–विज्ञान**–न., **मनोविज्ञानम्** ( कासू. २८ )
मनाचे विज्ञान.

**–विशेषकर**–वि., **सत्त्ववर्धनम्** ( असंशा. १.६६ )
सत्वाची वाढ.

**–संज्ञ**–वि., **मनः** ( चसू. १.५५ )
मन सत्व ही संज्ञा असलेले प्राणिमात्र.

**–संज्ञक**–वि., **प्राणिसंज्ञकः** ( **समुदयः** ) ( चशा. १.४७ )
सत्व संज्ञा असलेला, प्राणिसंज्ञक, ज्याला प्राणी म्हणतात. जीव.

**-संपद्**-स्त्री., **बलवृद्धिकरभावेष्वेकः, उत्कृष्टसत्त्वम्** ( चशा. ६.१३ )
मनाचे सर्व चांगले गुण व कर्म यांची संपन्नता, संपत्ति, उत्कृष्ट चांगल्या दर्जाचे मन. बलाची–सामर्थ्याची वाढ करणाऱ्या अनेक बाबीतील एक बाब.

**-संप्रयोग**-पु., **मनोगमनम्, मनःप्रचारः** (चशा. ३.३)
मनाचे जाणे, मनाचा प्रवेश. मन मिसळणे.

**-सार**-वि., **सत्त्वमेव सारो बलं स्थिरांशो वा यस्य स पुरुषः, प्रवरमध्यहीनभेदात्रिविधाः सत्त्वसाराः, तत्र सत्त्वसारः प्रवरसत्त्वः, तल्लक्षणम्- स्मृतिमान्भक्तिमान्कृतज्ञः प्राज्ञः शुचिर्महोत्साहो दक्षो धीरः समरविक्रान्तयोधी त्यक्तविषादः सुव्यवस्थित गतिर्गम्भीरबुद्धिचेष्टः कल्याणाभिनिवेशी च** ( चवि. ८.११०: सुसू. ३५.१६ ) **स्वल्पशरीरोऽप्यसौ निजागन्तु–निमित्तासु महतीषु पीडास्वपि निर्व्यथो दृश्यते। मध्यसत्त्वलक्षणम्–अपरानात्मन्युपनिधाय संस्तम्भयत्यात्मनाऽऽत्मानं परैश्चापि संस्तभ्यते। हीनसत्त्वलक्षणम्–असौ नात्मना, नापि परैः सत्त्वबलं प्रति शक्यते उपस्तम्भयितुं, महाशरीरोऽप्ययं स्वल्पानामपि वेदनानामसहो दृश्यते, सन्निहितभयशोकलोभमोहमानो रौद्रभैरवद्विष्टबीभत्सविकृतसंकथास्वपि च पशुपुरुषमांसशोणितानि चावेक्ष्य विषादवैवर्ण्यमूर्च्छोन्मादभ्रमप्रपतनानामन्यतममाप्नोति मरणमिति** (चवि. ८.११९)
ज्याचे मन सारवान्–बलवान्–स्थिर–विशुद्धतर आहे असा. हे तीन प्रकारचे उत्तम, मध्य व कनिष्ठ सारवान.

**उत्तम सारवान मनाचा पुरुष**– त्याचे मन केव्हाही खचत नाही, विषण्ण होत नाही. तो अगदी व्यवस्थित असतो. त्याचे बोलणे, चालणे, वागणे सर्व व्यवस्थित असते. खोल बुद्धीचा व दूरवर विचार करून वागणारा असतो. त्याची स्मरणशक्ति फार चांगली असते. समज फार चांगला, धैर्यवान, महान उत्साही, कोणत्याही कामाला तयार व मन लावून ते करणारा, समरांगणात पराक्रमी योद्धा असतो. तो नेहमी शुद्ध व पवित्र राहतो. कृतज्ञ भक्तिमान व सर्वांच्या कल्याणाच्या इच्छेने–वृत्तीने वागत असतो. हा शरिराने जरी लहान आकाराचा असला तरी शारीरिक किंवा आगंतुक अशा सर्व तीव्र वेदनामध्ये तो वेदना जणु होत नाहीत असा दिसतो. **मध्यम सारवान मनाचा पुरुष**–वेदना सहन करणारा दुसरा मनुष्य पाहून आपणही त्या सहन केल्या पाहिजेत असा बोध घेऊन वेदना सहन करण्याचे मनाचे सामर्थ्य निर्माण करतो. दुसऱ्याने समजावले, धीर दिल्यावरही तो सहिष्णु होतो. **कनिष्ठ अल्प सारवान मनाचा मनुष्य**– वरीलप्रमाणे दुसऱ्याकडे पाहून किंवा दुसऱ्याचे ऐकूनही धीर धरत नाही, सहिष्णुता उत्पन्न करू शकत नाही. मोठ्या धिप्पाड शरिराचा असूनही थोड्या वेदनाही तो सहन करू शकत नाही. तो चटकन भीति, शोक, लोभ, मोह यांच्या आहारी जातो, अगदी हळव्या मनाचा असतो. भयंकर क्रोधोत्पादक द्वेषाचा उद्रेक असलेल्या किळसवाण्या ओंगळ विकृत अशा गोष्टी कथा ऐकत असताना तसेच पशु किंवा मनुष्य यांचे मांस रक्त पाहूनही त्याचे मन विषण्ण होते. तो फिकट होतो, त्याला उन्माद, भ्रम होतो. किंवा मूर्च्छित होतो. खाली कोसळून पडतो; किंवा तो मरतोही.

**सत्त्वावजय**–पु., **अहितेभ्योऽर्थेभ्यो मनोनिग्रहः** ( चसू. ११.५४; असंसू. १२.५ )
अहितकर गोष्टी करणे किंवा सेवन करणे याबद्दलचा मोह आवरणे, मनोनिग्रह.

**सत्त्वोत्पत्ति**–स्त्री., **सत्त्वं कृम्यादिः प्राणी, तस्य जन्म** ( सुनि. ५.१८ )
सत्व म्हणजे कृमि, जंतु इत्यादी जीव, त्यांचा जन्म. जीवजंतूंची उत्पत्ति.

**सत्त्वोपादान**–वि., **मनःकरणः पुरुषः आत्मा जीवात्मा** ( चशा. ४.८ )
मन हे ज्याचे ज्ञानग्रहणाचे साधन आहे तो. आत्मा, जीवात्मा पुरुष.

**सदन**–न., **लक्षण० सादः, अङ्गसादः** ( चनि. १.३३; सुनि. १.३५ ) **अङ्गानामनुत्साहः** ( ड. सुउ. ६२.१०; अहसू. १२.५२ )
अंग गळणे. उत्साह नसणे. गळाठा.

**सदा**–अव्य., **नित्यम्, सततम्** ( असंचि. २.३ )
सतत, नित्य, नेहमी.

**-गति**-पु., दोष० वातः, वायुः
( सुउ. ५०.३०; असंचि. २.३ )
वात, वायु.

**-पुष्प**-पु., वनस्पति० अर्कः (रा. १०.२५; पृ. १३७)
रुई, मांदार.
कुन्दः ( ध. ५.१५०; पृ. २०१ ) कुंद.

**(-पुष्पा )**-स्त्री., वनस्पति० अर्कः ( चसू. ४.१३ )
रुई, मांदार.

**( -पुष्पी )**-स्त्री., वनस्पति० अर्कपुष्पिका
(चक्र. चक. १.१४; सुसू. ४३.३; असंसू. १४.३)
रुई.
राजार्कः ( ध. ४.१६; पृ. १३७ )
मांदार. पांढऱ्या फुलाची रुई.

**-प्रसून**-पु., वनस्पति० रोहितकः
( रा. ८.२१७; पृ. १९६ )
रोहडा, रक्तरोहडा.

**-फल**-पु., वनस्पति० उदुम्बरः
( ध. ५.८६; पृ. १८६ अहृसू. १५.४१; )
उंबर.
बिल्वः ( रा. ११.१३५; पृ. २७ ) बेल.

**-( फला )**-स्त्री., वनस्पति० त्रिसंधिः
( रापरि. १०.३७; पृ. ३२१ )
तिरसंधि.

**-भद्रा**-स्त्री., वनस्पति० काश्मरी (ड. सुउ.२४.३२ )
शिवण.

**-मांसी**-स्त्री., वनस्पति० मांसरोहिणीभेदः
( रा. १२.१३९; पृ. १५३ ) द्र० 'मांसरोहिणी'
लवयुक्त वाटोळ्या लाल फळांची वनस्पती.

**सदातुर**-वि., नित्यव्याधितः ( चसू. ७.४० )
नेहमी आजारी असलेला.
**कालभोजनं न समाचरन्ते, अकालनिर्हारविहारांश्च सेवन्ते ते सदातुराः । यथा वेदाध्ययनव्रताह्निकपरो द्विजः, नृपाद्युपसेवी परिचारकः, नृचित्तपरिवर्तिनी पणाङ्गना सदासनपरा अनुबन्धविक्रयादिलोभिनो वणिजः इत्यादयः** ( चसि. ११.२८-३० )
जे योग्य वेळी भोजन करीत नाहीत, मलमूत्रादि वेगांचे धारण किंवा अवेळी प्रवर्तन करतात ते नेहमी रोगग्रस्त असतात. जसे- वेदाध्ययन, व्रते व आन्हिकतत्पर ब्राह्मण, ( देहाकडे लक्ष देत नाहीत ) राजांचे किंवा धनिकांचे सेवक, आपल्याकडे आलेल्या पुरुषाचा कल पाहून वागणाऱ्या वेश्या, नित्य बैठकीचेच व्यवहार करणारे, आसक्ति ठेवून खरेदी विक्रीचा व्यवहार करणारे लोभी व्यापारी हे नेहमी रोगी असतात.

**सदृशकर्मत्व**-न., तुल्यक्रियात्वम्, **यथा सह गायतां गायनानां भिन्नगीतक्रियाणामप्यभिन्नगीतक्रियात्व-प्रतीतिः** ( ड. सुशा. ९.३ )
सारखी क्रिया करणे. जसे—जोडीने गाताना, जरी गाणारे गळे भिन्न असले तरी दोघांमिळून जणू एकाच जोड गळ्यातून गाणे गाइले जाते आहे अशी प्रतीती येणे. दोघे किंवा अनेक मिळून एकसमयावच्छेदे करून एक क्रिया करणे.

**सदृशांशक**-वि., तुल्यभागिकम् ( अहृसू. १४.२६ )
सारखे भाग असलेले.

**सदृशागमत्व**-न., **आप्तानां वचनमागमस्तस्य सदृशत्वम्, समानतन्त्रत्वम् यथा " आकाशीयावकाशानां देहे नामानि देहिनाम् । सिराः स्रोतांसि मार्गाः खं धमन्यः ॥ " इत्याप्तोपदिष्टेन सिरादिसादृश्येन न निर्धार्यं ज्ञायते सिरादिषु कस्येदं तोयादिवहनं कर्म** ( ड. सुशा. ९.३ )
आगम म्हणजे आप्तांचे वचन. आप्तवचन सारखे असणे म्हणजे समानतंत्रत्व होय. जसे-पोकळी असलेल्या अवयवांची ( प्राणी शरिरातल्या ) नावे; शिरा, स्रोतसे, मार्ग, धमनी इत्यादी आप्तवचनाने समजतात. शिरादिकांमध्ये जल, रक्त, रस इत्यादी वहनाचे कार्य कोणाचे, काय इ० केवळ शिरादिकांच्या सादृश्याने कळत नाही तर ते आप्तांच्या उपदेशानेच समजते.

**सद्मन्**-न., गृहम् ( सुचि. २५.२९ ) घर, सदन.

**सद्यस्**-अव्य., तत्कालम् झटिति ( असंशा. ११.३७ )
तत्काल, त्याच वेळी, झटकन.

**( सद्यः )-क्षतप्ररोह**-वि., तत्कालमेव क्षतस्य प्ररोहणं यत्र ( कासू. २८ )
जखम लवकर भरून आणणारे.

**-क्षतव्रण**-वि., लक्षण० तत्कालं क्षतयुक्तो व्रणो यस्य
( सुचि. २.८१ )
नुकताच आघाताने झालेला व्रण. ताजी जखम.

**-क्षीण**-वि., तत्कालं शीघ्रं वा बलावियिहीनः
( असंसू. २४.५७ )
आताच-नुकताच क्षीण झालेला, आताच बलक्षय झालेला. लवकर- वेगाने शक्ति क्षीण होणारा-

होण्याची प्रवृत्ति असलेला. उदाहरण- एक रेच होताच दुबळा झालेला.

**–प्रसूता**–वि., प्रजातमात्रा स्त्री. (का भोजनकल्प) नुकतीच बाळंत झालेली. बाळंत होऊन फारवेळ न झालेली.

**–प्राणहर**–वि., **आशु मृत्युकारकम्** ( चवि. ८.९४ ) ताबडतोब मरण आणणारे. शीघ्रमारक.

**–प्राणहरमर्मन्**–न., **तत्क्षणप्राणहरं मर्म, सद्यःशब्दः सप्तरात्राभ्यन्तरवाची** ( ड. सुशा. ६.२३ ) **तानि संख्ययैकोनविंशतिः–चत्वारि शृङ्गाटकानि, एकोऽधिपतिः, द्वौ शङ्खौ, अष्टौ मातृकाः, गुदं हृदयं बस्तिर्नाभिश्चेति** ( सुशा. ६.९; असंशा. ७.३०(१) ज्या मर्मस्थानावर आघात होताच मनुष्य लवकर मरतो ते मर्म. येथे सद्यः याचा अर्थ सात रात्रीच्या आत असा आहे. अशी मर्मे १९ आहेत. चार शृंगाटक, एक अधिपति, दोन शंख, आठ मातृका, गुद हृदय बस्ति व नाभि.

**–शुद्धि**–स्त्री., **तदहःकृतवमनविरेचनादिः** ( असंसू. ६.४५; हे. अहृसू. ५.१७ ) त्याच दिवशी ओकारी, रेच इत्यादींनी केलेली शरिराची शुद्धि.

**–स्नेह**–वि., **तदहरेव स्निग्धत्वापादकः, यथा प्राज्यमांसरसाः, स्नेहभर्जितपेयाः, सस्नेहफाणितस्तिलचूर्णः, कृशरा, घृताढ्योष्णा क्षीरपेया, सगुडो दध्नः सरः, लवणोल्बणाः स्नेहाश्च** ( अहृसू. १६.४०-४३ ) **बालवृद्धादिषु स्नेहपरिहारासहिष्णुष्वेते युक्ताः** ( असंसू. २५.६८ ) स्नेहविधीचे पथ्यापथ्य सहन न होणाऱ्या बाल, वृद्धादींना उपयोगी. त्याच दिवशी शरीर स्निग्ध करणारा स्नेह. जसे पुष्कळ प्रमाणात मांसरस, स्नेहाची फोडणी दिलेली पेज, स्नेह व काकवीयुक्त तिळाचे चूर्ण, खूप तूप घातलेली खिचडी, दुधाची पेज, गूळ घातलेली दह्याची साय. सैंधवयुक्त तेल, तूप इत्यादी स्नेह.

**–स्नेहन**–वि., **झटिति स्नेहनकरं द्रव्यम्, यवकोलकुलत्थक्वाथः पिप्पलीयुक्तः, पयो दधि सुरा घृतं चेति** ( सुचि., ३१.४३ ) **पिप्पल्यो लवणं घृततैलवसामज्जानो दधिमस्तुकादयश्च राजभ्यो राजसमेभ्यश्चाढ्येभ्य एते प्रयुक्ताः** ( सुचि. ३१.३८-४४; असंसू. २५.७५ ) ताबडतोब शरिराला स्निग्ध करणारे द्रव्य. जव, बोरे, कुळीथ यांचा पिंपळीयुक्त काढा. दूध, दही, दारू व तूप. पिंपळी, सैंधव, तूप, तेल, वसा, मज्जा, दह्याची निवळ इत्यादी द्रव्ये राजा किंवा राजासारख्या धनाढ्य व्यक्तींना उपयुक्त.

**(सद्यो)गृहीतगर्भा**–स्त्री., **सद्योलब्धगर्भा, तल्लक्षणानि– श्रमो ग्लानिः पिपासा सक्थिसदनं शुक्रशोणितयोरवबन्धो योनिस्फुरणं च** ( सुशा. ३.१३ ) **तथा प्रहर्षे हृल्लासस्तन्द्रा प्रसेको हृदयव्यथा गरिमा तृप्तिश्च** ( असंशा. २ ) काल आज गर्भ राहिल्याची लक्षणे—थकवा, ग्लानी, तहान, मांड्या गळणे. शुक्र व रज यांचा अवरोध. योनीच्या ठिकाणी स्फुरण होणे, तसेच जडपणा डोळ्यांवर झापड, ओकारी सारखे वाटणे, तोंडाला पाणी सुटणे, हृदयात अस्वस्थ वाटणे, आनंद होणे व तृप्तता वाटणे.

**–बलकर**–वि., **झटिति बलप्रदम्** ( सुसू. ४६.४११ ) ताबडतोब बल देणारे.

**–भुक्त**–वि., **अप्राप्तविदाहावस्थः ( उद्गारादिः )** ( अहृसू. ८.२५ ) नुकतेच जेवण झालेला. अन्न पचण्यास सुरवातही न झालेला चिन्हे–ढेकर, तृप्ति, ग्लानी, जडपणा इत्यादी.

**–मण्डलपत्रक**–पु., **पुनर्नवाभेदः रक्तपुनर्नवा** ( ध. १.२७६ ) द्र० ' पुनर्नवा ' पुनर्नवाप्रकार. तांबडा पुनर्नवा.

**–मरणीय**–वि., **अध्यायसंज्ञा०** ( चइ. १०.१ ) अध्यायाचे नांव. यात लवकरच म्हणजे तत्काल, तीन किंवा सात दिवसांच्या आत मरणाराची लक्षणे सांगितली आहेत.

**–व्रण**–पु., **आगन्तुव्रणः** ( सुचि. २.१ ) **प्रहर्तृयन्त्रायुधाघातगात्रेर्जायमानो व्रणः** (असंउ. ३१; अहृसू. २९.४९ ) यंत्र, शस्त्र, कठिण वस्तु यांचा आघात कुणाकडून अथवा अकस्मात झाल्याने नुकताच झालेला व्रण, आगंतुक व्रण.

**–व्रणचिकित्सित**–न., **अध्यायसंज्ञा०** (सुचि. २.१) अध्यायाचे नांव. नुकत्याच झालेल्या व्रणाचे उपचार यात आहेत.

**–व्रणविनिश्चय**–पु., **सद्योव्रणानां निदानम्** ( सुचि. २.९५ ) ताज्या व्रणाचे निदान. कारणे स्वरूप इत्यादिकांचा विचार करून व्रणाचे वर्गीकरणाने वैशिष्ट्य ठरवणे.

**सद्यस्क**-वि., आशुसमुद्धृतम् ( चसि. ६.८२ )
ताजे, नुकतेच काढलेले (लोणी). शेळी इत्यादींचे मिळविलेले ताजे रक्त.

**सद्योऽनुगत**-वि., सद्योगृहीतम् ( गर्भादि )
( चशा. २.२२ )
नुकताच राहिलेला (गर्भ). नुकतेच घेतलेले.

**( सद् )-रत्न**-न., खनिज० हीरकम्
( ध. ६.५५; पृ. २१६ )
हिरा.

**-वचन**-न., सतां वचनम्, आगमवचनं वा, इदमनुष्ठेयानां श्रेष्ठम् ( चसू. २५.४०; असंसू. १३.३) सज्जनांचे वचन. शास्त्रवचन. सिद्धांत वचन. आचरणात आणण्या सारख्या सर्व बाबतीत हे श्रेष्ठ.

**-वृत्त**-न., शान्तिशौचाचारादियुक्ताः सन्तः, तेषां वर्तनम् (चसू. ७.५३ ) सतां देहवाङ्मनःप्रवृत्तिरूपमनुष्ठानम् ( चसू. ८.१७; अहसू. ४.३२ ) आत्महितं चिकीर्षता सर्वेण सर्वं सर्वदा स्मृतिमास्थाय सद्वृत्तमनुष्ठेयम्, तद्यथा देवगोब्राह्मणगुरुवृद्धसिद्धाचार्यानर्चयेत्, अग्निमुपचरेत्, औषधीः प्रशस्ता धारयेत्, द्वौ कालावुपस्पृशेत्, मलायनेष्वभीक्ष्णं पादयोश्च वैमल्यमादध्यात्, त्रिः पक्षस्य केशश्मश्रुलोमनखान् संहारयेत्, नित्यमनुपहतवासाः, सुमनाः सुगन्धिः स्यात्, साधुवेशः,प्रसिद्धकेशः, मूर्धश्रोत्रघ्राणपादतैलनित्यः, धूमपः, पूर्वाभिभाषी, सुमुखः, दुर्गेष्वभ्युपपत्ता, होता, यष्टा, दाता, चतुष्पथानां नमस्कर्ता, बलीनामुपहर्ता, अतिथीनां पूजकः, पितृभ्यः पिण्डदः, काले हितमितमधुरार्थवादी, वश्यात्मा, धर्मात्मा, हेतावीर्ष्युः, फले नेर्ष्युः, निश्चिन्तः, निर्भीकः, ह्रीमान्, धीमान्, महोत्साहः, दक्षः, क्षमावान्, धार्मिकः, आस्तिकः विनयबुद्धिविद्याभिजनवयोवृद्धसिद्धाचार्याणामुपासिता, छत्री, दण्डी, मौली, सोपानत्को, युगमात्रदृग्विचरेत्, मङ्गलाचारशीलः, कुचैलास्थिकण्टकामेध्यकेशतुषोत्करभस्मकपालस्नानबलिभूमीनां परिहर्ता, प्राक् श्रमाद्व्यायामवर्जी स्यात्, सर्वप्राणिषु बन्धुभूतः स्यात्, क्रुद्धानामनुनेता, भीतानामाश्वासयिता, दीनानामभ्युपपत्ता, सत्यसंधः,सामप्रधानः, परपरुषवचनसहिष्णुः, अमर्षघ्नः, प्रशमगुणदर्शी, रागद्वेषहेतूनां हन्ता च, नानृतं ब्रूयात्, नान्यस्वमाददीत, नान्यस्त्रियमभिलषेन्नान्यश्रियं वा, न वैरं रोचयेत्, न कुर्यात् पापं, न पापेऽपि पापी स्यात्, नान्यदोषान्ब्रूयात्, नान्यरहस्यमागमयेत्, नाधार्मिकैर्न नरेन्द्रद्विष्टैः सहासीत, नोन्मत्तैर्न पतितैर्न भ्रूणहन्तृभिर्न क्षुद्रैर्न दुष्टैः, न दुष्टयानान्यारोहेत्, न जानुसमं कठिनमासनमध्यासीत, नानास्तीर्णमनुपहितमविशालमसमं वा शयनं प्रपद्येत, न गिरिविषममस्तकेष्वनुचरेत्, न द्रुममारोहेत्, न जलोग्रवेगमवगाहेत, न कूलच्छायामुपासीत, नाग्न्युत्पातमभितश्चरेत्, नोच्चैर्हसेत्, न शब्दवन्तं मारुतं मुञ्चेत्, नानावृतमुखो जृम्भां क्षवथुं हास्यं वा प्रवर्तयेत्, न नासिकां कुष्णीयात्, न दन्तान् विघट्टयेत्, न नखान् वादयेत्, नास्थीन्यभिहन्यात्, न भूमिं विलिखेत्, न छिन्द्यात्तृणं, न लोष्टं मृद्नीयात्, न विगुणमङ्गैश्चेष्टेत, ज्योतींष्यनिष्टममेध्यमशस्तं च नाभिवीक्षेत, न हुंकुर्याच्छवं, न चैत्यध्वजगुरुपूज्याशस्तच्छायामाक्रामेत्, न क्षपास्वमरसदनचैत्यचत्वरचतुष्पथोपवनश्मशानाघातनान्यासेवेत, नैकः शून्यगृहं न चाटवीमनुप्रविशेत्, न पापवृत्तान् स्त्रीमित्रभृत्यान् भजेत्, नोत्तमैर्विरुध्येत, नावरानुपासीत, न जिह्मं रोचयेत्, नानार्यमाश्रयेत्, न भयमुत्पादयेत्, न साहसातिस्वप्नप्रजागरस्नानपानाशनान्यासेवेत, नोर्ध्वजानुश्चिरं तिष्ठेत्, न व्यालानुपसर्पेन्न दंष्ट्रिणो न विषाणिनः, पुरोवातातपावश्यायातिप्रवाताञ्जह्यात्, कलिं नारभेत, नासुनिभृतोऽग्निमुपासीत नोच्छिष्टः, नाधः कृत्वा प्रतापयेत्, नाविगतक्लमो नानाप्लुतवदनो न नग्न उपस्पृशेत्, न स्नानशाट्या स्पृशेदुत्तमाङ्गं, न केशाग्राण्यभिहन्यात्, नोपस्पृश्य ते एव वाससी बिभृयात्, नास्पृष्ट्वा रत्नाज्यपूज्यमङ्गलसुमनसोऽभिनिष्क्रामेत्, न पूज्यमङ्गलान्यपसव्यं गच्छेन्नेतराण्यनुदक्षिणम्, नारत्नपाणिर्नास्नातो नोपहतवासा नाजपित्वा नाहुत्वा देवताभ्यो, नानिरूप्य पितृभ्यो, नादत्त्वा गुरुभ्यो, नातिथिभ्यो, नोपाश्रितेभ्यो; नापुण्यगन्धो नामाली नाप्रक्षालितपाणिपादवदनो नाशुद्धमुखो नोदङ्मुखो न विमना नाभक्ताशिष्टाशुचिक्षुधितपरिचरो न पात्रीष्वमेध्यासु नादेशे नाकाले नाकीर्णे नादत्त्वाऽग्रमग्नये नाप्रोक्षितं प्रोक्षणोदकैर्न मन्त्रैरनभिमन्त्रितं न कुत्सयन्न कुत्सितं न प्रतिकूलोपहितमन्नमाददीत, न पर्युषितमन्यत्र मांसहरितकशुष्कशाकफलभक्ष्येभ्यः, नाशेषभुक् स्यादन्य-

त्राद्दधिमधुलवणसक्तुसर्पिर्भ्यः, न नक्तं दधि भुञ्जीत, न सक्तूनेकानश्नीयान्न निशि न भुक्त्वा न बहून्न द्विर्नोदकान्तरितात्, न छित्त्वा द्विजैर्भक्षयेत्, नानृजुः क्षुयान्नाद्यान्न शयीत, न वेगितोऽन्यकार्यः स्यात्, न वाय्वग्निसलिलसोमार्कद्विजगुरुप्रतिमुखं निष्ठीविका (वात) वर्चोमूत्राण्युत्सृजेत्, न पन्थानमवमूत्रयेन्न जनवति नान्नकाले, न जपहोमाध्ययनबलिमङ्गलक्रियासु श्लेष्मसिङ्घाणकं मुञ्चेत्, न स्त्रियमवजानीत, नातिविश्रम्भयेत्, न गुह्यमनुश्रावयेत्, नाधिकुर्यात्। न रजस्वलां नातुरां नामेध्यां नाशस्तां नानिष्टरूपाचारोपचारां नादक्षां नादक्षिणां नाकामां नान्यकामां नान्यस्त्रियं नान्ययोनिं नायोनौ न चैत्यचत्वरचतुष्पथोपवनश्मशानाघातनसलिलौषधिद्विजगुरुसुरालयेषु न संध्ययोर्नातिथिषु नाशुचिर्नाजग्धभेषजो नाप्रणीतसंकल्पो नानुपस्थितहर्षो नाभुक्तवान्नात्यशितो न विषमस्थो न मूत्रोच्चारपीडितो न श्रमव्यायामोपवासक्लमाभिहतो नारहसि व्यवायं गच्छेत्, न सतो न गुरून् परिवदेत्, नाशुचिरभिचारकर्मचैत्यपूज्यपूजाध्ययनमभिनिर्वर्तयेत्, न विद्युत्स्वनार्तवीषु, नाभ्युदितासु दिक्षु, नाग्निसंप्लवे, न भूमिकम्पे, न महोत्सवे, नोल्कापाते, न महाग्रहोपगमने, न नष्टचन्द्रायां तिथौ, न संध्ययोर्नामुखाद्गुरोर्नावपतितं नातिमात्रं न तान्तं न विस्वरं नानवस्थितपदं नातिद्रुतं न विलम्बितं नातिक्लीबं नात्युच्चैर्नातिनीचैः स्वरैरध्ययनमभ्यस्येत्, नातिसमयं जह्यात्, न नियमं भिन्द्यात्, न नक्तं नादेशे चरेत्, न संध्यास्वभ्यवहाराध्ययनस्त्रीस्वप्नसेवी स्यात्, न बालवृद्धलुब्धमूर्खक्लिष्टक्लीबैः सह सख्यं कुर्यात्, न मद्यद्यूतवेश्याप्रसङ्गरुचिः स्यात्, न गुह्यं विवृणुयात्, न कश्चिदवजानीयात्, नाहंमानी स्यान्नादक्षो नादक्षिणो नासूयकः, न ब्राह्मणान् परिवदेत्, न गवां दण्डमुद्यच्छेत्, न वृद्धान्न गुरून्न गणान्न नृपान् वाऽधिक्षिपेत्, न चातिब्रूयात्, न बान्धवानुरक्तकृच्छ्रद्वितीयगुह्यज्ञान् बहिष्कुर्यात्, नाधीरो नात्युच्छ्रितसत्त्वः स्यात्, नाभृतभृत्यः, नाविश्रब्धस्वजनः, नैकः सुखी, न दुःखशीलाचारोपचारः, न सर्वविश्रम्भी, न सर्वाभिशङ्की, न सर्वकालविचारी, न कार्यकालमतिपातयेत्, नापरीक्षितमभिनिविशेत्, नेन्द्रियवशगः स्यात्, न चञ्चलं मनोऽनुभ्रामयेत्, न बुद्धीन्द्रियाणामतिभारमादध्यात्, न चातिदीर्घसूत्री स्यात्, न क्रोधहर्षावनुविदध्यात्, न शोकमनुवसेत्, न सिद्धावुत्सेकं यच्छेन्नासिद्धौ दैन्यं, प्रकृतिमभीक्ष्णं स्मरेत्, हेतुप्रभावनिश्चितः स्याद्धेत्वारम्भनित्यश्च, न कृतमित्याश्वसेत्, न वीर्यं जह्यात्, नापवादमनुस्मरेत्, नाशुचिरुत्तमाज्याक्षततिलकुशसर्षपैरग्निं जुहुयादात्मानमाशीर्भिराशासानः, अग्निर्मे नापगच्छेच्छरीराद्वायुर्मे प्राणानादधातु, विष्णुर्मे बलमादधातु, इन्द्रो मे वीर्यं, शिवा मां प्रविशन्त्वाप आपोहिष्ठेत्यपः स्पृशेत्; द्विः परिमृज्योष्ठौ पादौ चाभ्युक्ष्य मूर्धनि खानि चोपस्पृशेदद्भिरात्मानं हृदयं शिरश्च, ब्रह्मचर्यज्ञानदानमैत्रीकारुण्यहर्षोपेक्षाप्रशमपरश्च स्यादिति

(चसू. ८.१७-२९)

सज्जनांचे वर्तन. शुचित्व, शांतियुक्त आचारविचारी पुरुषांचे वर्तन. सज्जनांच्या कायावाचामन प्रवृत्तींना अनुसरून आपले वागणे असावे. आपले हित इच्छिणाऱ्या प्रत्येकाने नेहमी सर्व स्मरणात ठेवून सद्वृत्ताचे आचरण करावे. त्यासाठी देव, गाय, ब्राह्मण गुरु, वृद्ध, सिद्ध, आचार्य यांची पूजा करावी. अग्नीची सेवा करावी. प्रशस्त औषधी अंगावर धारण कराव्या. दोन्ही वेळा स्नान करावे. हात पाय व सर्व मलमार्ग निर्मळ ठेवावे. पंधरवड्यातून तीनदा केस, दाढी मिशा, लव, व नखे काढावीत. मलीन कपडा वापरू नये, धुऊन वापरावा. सुगंधी तेल, अत्तर, फुले इ० द्रव्ये वापरावी. मन प्रसन्न ठेवावे. वेष नीटनेटका, केस स्वच्छ व्यवस्थित असावे. डोके पाय यांना नेहमी तेल चोळावे व कानानाकातही घालावे. विधियुक्त धूम्रपान करावे. कोणी भेटला असतां आपण प्रथम बोलावे. हसतमुख असावे. संकटात सापडलेल्यांना मदत करावी, होम करावा, यज्ञ करावा. गरजूंना देत असावे. चौरस्त्यावर नमस्कार करावा. बलवानांचा सन्मान करावा. अतिथींची पूजा करावी. पितरांचे श्राद्ध करावे. काळवेळ पाहून हितकर गोड मोजके बोलावे. मनोनिग्रही असावे. धार्मिक असावे. कारणासाठी स्पर्धा असावी, पण फलाची स्पर्धा असू नये. निश्चित, निर्भय, बुद्धिमान, महान, उत्साही, कोणत्याही कार्यात दक्ष, क्षमाशील, धार्मिक, आस्तिक असावे. विनयशील, बुद्धिमान, विद्वानांच्या कुलातील

वृद्ध, सिद्धि मिळवलेले व आचार्य यांची सेवा करावी. बाहेर जाताना जवळ छत्री, काठी असावी. डोक्याला शिरस्त्राण घातलेले असावे. पायात पायतण असावे, व चालताना चार हात पुढे पाहून चालावे. पवित्र आचार–विचार असावे. हाडे, काटे मळ, केस, तुसाचा ढीग, उकीरडा, राख, खापरे असलेली व स्नान करावयाची व बळी द्यावयाची जागा वर्ज्य करावी. थकवा येण्यापूर्वी व्यायाम बंद करावा. सर्व प्राण्यांना भावांप्रमाणे मानावे. रागवलेल्याना शांत करावे. भ्यालेल्याना धीर द्यावा. दीन-दुबळ्यांना मदत करावी. शांतवृत्तीने असावे. सत्याचा पक्षपाती व सत्याचरणी, दुसऱ्याशी सलोखा ठेवण्याच्या वृत्तीने असावे. दुसऱ्याचे कठोर बोलणे सहन करावे. आपला क्रोध आवरावा. क्षमाशील असावे. शांत गुण व्यक्त करावा. आसक्ति व द्वेष यांच्या कारणांचा नाश करावा. खोटे बोलू नये. दुसऱ्याचे काहीही अपहरण करू नये. परस्त्रीची व दुसऱ्याच्या यशाची अभिलाषा करू नये. कोणाशीही वैर नसावे. पाप करू नये. पाप करणाऱ्याशीही पाप करू नये. दुसऱ्याचे दोष बोलू नये. दुसऱ्याच्या गुप्त गोष्टी जाणून घेण्याचा प्रयत्न करू नये. अधार्मिक व राजाचा द्वेष करणारांशी संपर्क ठेवू नये. तसेच उन्मत्त, पापकर्मी, गर्भपात करणारा, क्षुद्र, दुष्ट यांच्याशीही संपर्क नसावा. दुष्ट वाहन घोडा, बैल, हत्ती, इत्यादी वाहने व मोडकी गाडी इत्यादींचा कोठेही जाण्याकरिता उपयोग करू नये. गुडघ्याइतक्या उंच व कठिण आसनावर बसू नये. चांगले लांब रुंद नसलेले, खाच खळगे असल्यामुळे साफ नसलेले, ढेकूण इत्यादी असलेले व वर चादर पलंगपोस न आंथरलेले आंथरूण वापरू नये, त्यावर झोपू नये. तुटलेल्या डोंगर माथ्यावर चढू नये. झाडावर चढू नये. जास्त वेगाच्या पाण्यात पोहू नये. नदीच्या किनाऱ्याच्या छायेत बसू नये. आग लागली असता व इतर उत्पात झाला असता त्याच्या भोवती राहू नये. मोठ्याने हसू नये, मोठ्याने पादू नये. तोंडावर काही धरल्याशिवाय ( हातरुमाल, हात इ० ) जांभई शिंक देऊ नये किंवा हसू नये. नाक कोरू नये. दात खाऊ नयेत, नखे वाजवू नयेत. हाडे एकमेकांवर आदळू नयेत, जमिनीवर रेघोट्या ओढू नयेत. गवत तोडू नये. ढेकूळ दाबून चोळू नये. वेड्यावाकड्या अंगाच्या हालचाली-चेष्टा करू नयेत. तेजस्वी प्रकाश, नको असलेले, ओंगळ, भेसूर दृश्य पाहू नये. प्रेताला ‘ हुं ’ करू नये. गावातील, पार बांधलेला जुना मुख्य वृक्ष, ध्वज, गुरु, पूज्य व्यक्ति, अप्रशस्त वस्तु, यांची छाया ओलांडू नये. रात्री देऊळ, वृक्ष, आंगण, चौरस्ता, बगीचा, स्मशान व वधस्थान यांत राहू नये. कोणी रहात नसलेल्या घरात व रानात एकटे प्रवेश करू नये. दुर्वर्तनी स्त्री, मित्र व चाकर यांना जवळ ठेवू नये. संबंध सोडावा. श्रेष्ठांशी विरोध करू नये. कनिष्ठांशी संघट्टन असू नये. कपटी मनुष्याशी स्नेह ठेवू नये. नीचाच्या आश्रयास जाऊ नये. भीति दाखवू नये. साहस, अति झोप, अति जागरण, अति स्नान, अति मद्यपान, अत्याहार करू नये. गुडघ्यावर उकीडवे खूप वेळ बसू नये. वाघ सिंह इ० हिंस्र प्राणी, दंश करणारे सर्पादी व शिंगे असणारे गाई–बैल इत्यादी प्राण्यांच्या जवळ जाऊ नये. पूर्वेकडचा वारा व ऊन, दंव, अति जोराचा वारा ( वादळ ) अंगावर घेऊ नये. मुद्दाम भांडण उकरून काढू नये. नीट न ठेवलेल्या अंगानिशी अग्नीला खाली ठेवून शरीर तापवू नये. आलेला थकवा गेल्यावाचून, तोंड धुतल्यावाचून व नग्न असताना स्नान करू नये. स्नानानंतर सर्व अंग पुसण्याच्या वस्त्राने डोके पुसू नये. केसांची टोके झटकू नयेत. स्नान केल्यावर स्नानाचेच वा पहिलेच (पारोसे) कपडे वापरू नयेत. बाहेर कामाला जाताना रत्न, तूप, पूज्य व्यक्ति व वस्तु, मंगल वस्तु यांना स्पर्श केल्यावाचून जाऊ नये. चांगल्या प्रसन्न मनाने निघावे. पूज्य, मंगल व्यक्ति व वस्तूंना डावे घेऊन जाऊ नये व अपूज्य, अमंगलांना उजवे घेऊन जाऊ नये. हातात रत्न घातल्यावाचून, स्नान केल्यावाचून, फाटके जुने वस्त्र नेसून, जप केल्यावाचून, देवताना हवन न करता, पितृतर्पण व ब्रह्मकर्म न करता, देव, गुरु, अतिथी, आश्रित यांना न देता, माळ गळ्यात नसता, हातपाय तोंड न धुता, अशुद्ध तोंड असता, उत्तरेकडे तोंड करून विमनस्क असता, आपल्यावर भाव नसलेल्या, असभ्य, अपवित्र व भुकेलेल्या नोकरांसमक्ष, घाण ताटवाटीत,

अनुकूल ठिकाण व काळ नसताना, गजबजलेल्या ठिकाणी प्रथम अग्नीला न देता ( वैश्वदेव न करता ) प्रोक्षण न करता, प्रोक्षणाच्या पाण्याने, मंत्रानी पवित्र केल्यावाचून, अन्नांतील दोष काढून निंदा करून, आपला विरोधी आपल्या पंक्तीला घेऊन जेवू नये. मांस, हिरवी कच्ची कोथिंबीर इत्यादी सुकलेली भाजी फळे यावाचून शिळे खाऊ नये. दही, मध, मीठ, सातु व तूप यांखेरीज पानात इतर अन्न थोडे तरी शिल्लक ठेवल्यावाचून जेवण पुरे करू नये. रात्री दही खाऊ नये. सातु तूप साखर घातल्यावाचून, पुष्कळ प्रमाणात, मधून मधून पाणी पिऊन, दातांनी तोडून खाऊ नये. शरीर वेडेवाकडे असताना शिंकू नये, जेवू नये व निजू नये. मळ मूत्र यांच्या उत्सर्जनाचे वेग आल्यानंतर ( उ. शौचाला लागली असता ) दुसरी कामे करू नयेत. वारा, अग्नि, पाणी, चंद्र, सूर्य, ब्राह्मण, गुरु, यांच्यासमोर शौचाला-लघ्वीला बसू नये. पादू नये व थुंकू नये. रस्त्यावर लघ्वी करू नये, लोकांच्या समुदायाच्या जागेत, भोजनाच्या वेळी लघ्वी करू नये. जप, होम, अध्ययन, बळी, मंगलकर्म करीत असता शिंकरू नये. स्त्रियांचा अपमान करू नये, त्यांच्यावर अति विश्वास ठेवू नये. त्याना गुप्त गोष्टी सांगू नयेत. त्यांच्यावर सर्वत्र अधिकार सोपवू नये. रजःस्वला, (तीन दिवसातली) रोगी, अपवित्र, अशुभ, नावडते रूप असलेली, नापसंत वागणूक व सेवा करणारी. अयोग्य, डावीकडे असलेली, संभोगेच्छा नसलेली, दुसऱ्यावर प्रेम करणारी, अशा पत्नीशी संभोग करू नये. दुसरी स्त्री, अमानवी स्त्री ( गाय, शेळी अशी दुसरी योनि) दुसऱ्या वर्णाची स्त्री, यांच्याशी संभोग करू नये. योनी खेरीज गुद इत्यादी द्वारात, झाडाखाली, बागेत, चवाठा, चार रस्त्यात, स्मशान, हत्या किंवा बळीचे स्थान. पाण्यात, औषधालय, ब्राह्मण-गुरु यांचे घर, देवालय, संधिकालात, अयोग्य तिथीला, स्वतः अपवित्र असताना, अयोग्य अशी शुक्रवर्धक औषधे घेऊन, संभोगाची इच्छा व प्रवृत्ति नसताना, इंद्रिय ताठ नसताना, उपाशी किंवा खूप जेवण झाल्यावर, वेड्यावाकड्या अंगाने, किंवा उंच-सखल शय्येवर, शौचाला व लघ्वीला लागलेले असताना, परिश्रम-व्यायाम-लंघन यांनी थकलेल्या स्थितीत, एकांत नसताना संभोग करू नये. सज्जन व गुरु यांची निंदा करू नये. अमंगळ असताना अध्ययन, अभिचारकर्म, वृक्ष किंवा पूजार्ह यांची पूजा करू नये. ऋतुकाल नसता, वीज चमकत असेल तर, सर्व दिशा तापल्या असता, आग लागली असता, भूकंपाच्या वेळी, उल्का पडत असता, मोठा उत्सव चालू असता, ग्रहणात, नष्टचंद्र तिथीला, संधिकाळात, गुरूच्या तोंडून उच्चार झाल्यावाचून, वर्णोच्चार नीट न करिता, कर्कश स्वरात, बेसूर, अव्यवस्थित किंवा अति स्थिर उच्चार अतिशय घाईने, अतिशय उशिराने, अति उँच किंवा अगदी खालच्या स्वरात अध्ययन करू नये. उगीच फार वेळ घालवू नये. नियम सोडून वागू नये. रात्री व अयोग्य किंवा माहीत नसलेल्या ठिकाणी जाऊ नये. संधिकाळात भोजन अध्ययन झोप व संभोग करू नये. बालक, म्हातारे, लोभी, मूर्ख, तिरस्करणीय रोगांनी ग्रस्त व हलक्या मनाच्या लोकांशी सख्य ठेवू नये. मद्य, जुगार व वेश्या गमनाची आवड नसावी. गुह्य—दुसऱ्यास न सांगण्यासारखे असेल त्याची चर्चा करू नये. कोणाचाही तिरस्कार करू नये. गर्विष्ट, अहंमन्य असू नये. असावध, अप्रामाणिक, मत्सरी असू नये. ब्राह्मणाची निंदा करू नये. गाईला दंडा मारू नये. अतिशय बोलू नये. म्हातारे, गुरु, समुदाय, राजा यांची निर्भर्त्सना करू नये. बांधव, लोभ ठेवणारे, संकटात मदत करणारे व आपली गुह्ये व वैगुण्ये माहीत असणारे यांचा अपमान करू नये. भित्रे किंवा एकदम क्षुब्ध असू नये. धैर्य सोडू नये, मोबदला न देता सेवा घेऊ नये, स्वतःच्या लोकावर अविश्वास दाखवूं नये. एकट्याने सुख भोगू नये. आचार आणि स्वभाव किंवा वागणूक तापदायक नसावी. सर्वांवर विश्वास ठेवू नये. तसेच सर्वांवर अविश्वासही दाखवू नये. सदा सर्वकाळ विचारात-चिंतेत असू नये. कामाची वेळ टाळू नये. परीक्षा केल्यावाचून, योग्य वाटल्यावाचून प्रेम करू नये, इंद्रियांच्या ताब्यात जाऊ नये. चंचल मनाला गोंधळात पाडू नये. बुद्धि, मन व इंद्रिये यांना अति श्रम देऊ नयेत. अतिदीर्घसूत्री असू नये. क्रोध व हर्ष या दोघांच्या ताब्यात जाऊ नये. दीर्घकाल शोकाला थारा देऊ

नये. कार्यसिद्धीच्या प्रसंगी अति गर्विष्ट होऊ नये व अपयशाने खिन्न होऊ नये. नेहमी अनित्य अशा प्रकृतीचे स्मरण करावे, चांगल्या कृत्याची फळे चांगलीच व वाइटाची वाईट अशीच मनाची निश्चित धारणा असावी. नेहमी चांगल्याचाच आरंभ करावा. अमूक काम केले असे समजून निर्धास्त असू नये. उत्साह टाकू नये. आपल्यावर आलेल्या अपवादाचे स्मरण करू नये. अपवित्र अशा गाईचे तूप, अक्षता, तीळ, दर्भ, मोहरी या द्रव्यानी होम करू नये. श्रेष्ठांच्या आशीर्वादाची आशा अपेक्षा करावी. 'अग्निर्मे...' या मंत्राने स्नान करावे. दोनदा पाय व ओठ धुवून डोळ्यांवर पाण्याचे सिंचन करून, पाण्याने सर्व च्छिद्रे धुवावी, आचमन करावे. आपल्या हृदयाला व डोक्याला इंद्रियांना पाणी लावावे. ब्रह्मचर्याचे पालन करावे व ज्ञानदान, सर्व प्राण्याशी मैत्री असावी. दया, आनंद, त्याग व इंद्रियांचे नियंत्रण करावे.

**-व्रत**-न., **सतां व्रतम्, अवश्यकर्तव्योऽर्थः, त्यागः, आर्द्रसन्तानता, कायवाक्चेतसां दमः, परार्थेषु स्वार्थबुद्धिरित्यादीनि सद्व्रतानि** ( अहृसू. २.४६ ) सज्जनांचे व्रत. अवश्य केलेच पाहिजे असे. दान, सर्व प्राण्यांवर दया, शरीर, वाचा व मन यांचे नियंत्रण. आपले समजून दुसऱ्या करिता श्रम करणे.

**-वैद्यद्वेष**-पु., **सद्वैद्य विषयेऽप्रीतिः** ( असंसू. १३.३) चांगल्या वैद्याचा द्वेष.

**सनालक**-पु., **वनस्पति० जीवन्तः** ( रापरि. ७.८९; पृ. ३५५ )
तांबड्या नाळाची व लाल पानांची एक वनस्पती, (पोकळा) माळव्यात प्रसिद्ध.

**सनिग्रह**-वि., **सवारङ्गं संदंशयन्त्रादि** ( सुसू. ७.११ )
मूठ असलेले (यंत्र, शस्त्रादी).

**संतत**-वि., **निरन्तरम्** ( चचि. ३.५३ )
निरंतर. सातत्याने असणारा.

**-ज्वर**-पु., **रोग० ज्वरभेदः, संततज्वरः रसवाहिभिः स्रोतोभिर्विसृताः सर्वदेहानुगा वातादयो गुरवः दोषाविच्छिन्नं ज्वरं कुर्वन्ति । संतत्या सप्ताहादीन् व्याप्याऽविसर्गी अतः संतत इत्युक्तः । वातिकः संततः सप्तरात्रेण, पैत्तिको दशरात्रेण, श्लैष्मिको द्वादशाहेन ज्वरः पाकं प्रगच्छति । स शीघ्रं शीघ्रकारित्वात्, प्रशमं याति हन्ति वा । कालदूष्यप्रकृतिभिस्तुल्यो दोषो निष्प्रत्यनीकः सन् संततज्वरं कुरुते । अतः स दुस्सहः । संततो द्वादशाश्रयी उक्तः वातादिस्त्रिदोषाः रसादिसप्तधातवो मूत्रं पुरीष चेति संततस्य द्वादश आश्रयाः । यदा सर्वे रसादिका आश्रया विशुद्धा भवन्ति, तदा संततः ज्वरः प्रशाम्यति । यदा वा एते रसादयः सर्वे सर्वथा वा अविशुद्धा भवन्ति, तदा स मानवं हन्ति । यदा तु संततस्य एते आश्रयाः नातिशुद्धयन्ति सर्वशो वा न शुध्ययन्ति, तदा द्वादशेऽहन्यव्यक्तलक्षणं विसर्गं कृत्वा दीर्घमपि कालमनुवर्तते । अस्योपशमोऽपि तदा दुर्लभो भवति** ( चचि. ३.५३-५९ )
विषम ज्वरांपैकी एक. जो सातत्याने अनेक दिवस राहतो तो. संप्राप्ति-रसधातुवाही स्रोतसांतून सर्व शरीरभर पसरलेले वातादी गुरु दोष सात दहा किंवा बारा दिवस मुदतीचा ज्वर करतात. त्यास संतत म्हणतात. वातिक सात, पैत्तिक दहा, व कफज बारा दिवस रहातो. तो वेगवान असल्याने त्वरेने शमतो किंवा मारतो. संतत ज्वर करणारा दोष शरिराची प्रकृति, दूष्य ( धातु ), व ज्या ऋतूत येतो तो काल यांच्याशी सारख्या गुणाचा असल्यामुळे, दोषांचा प्रतिकार करणारे हे प्रकृत्यादी तिघे दोषाच्या विपरीत गुणांचे नसल्यामुळे दोषांचा प्रतिकार करू शकत नाही. दोषाला शरिरात कोणीच प्रतिकार करणारे नसल्यामुळे संतत ज्वर होतो. म्हणून तो सहन करण्यास कठीण होतो. त्याचे वातादी दोष तीन, रसादि धातु सात व मूत्र आणि पुरीष दोन असे बारा आश्रय असतात. हे सर्व आश्रय विशुद्ध झाले तर ज्वर थांबतो. हे सर्व ज्वरात अशुद्ध रहातात तेव्हा रोगी मरतो. जेव्हा हे अतिशय शुद्ध किंवा सर्वस्वी शुद्ध होत नाहीत तेव्हा बाराव्या दिवशी लक्षणे अव्यक्त होऊन तो थांबतो पण दीर्घकाल तसा येत असतो व त्याचा उपशमही दुर्लभ होतो.

**संतति**-स्त्री., **सातत्यम्** ( चशा. २.४२ ) **नैरन्तर्यम्** ( ड. सुउ. ३९.६९ )
सातत्य, सतत असणे-निर्माण होणे, निरंतरत्व.

**संतमक**-पु., **तमकश्वासभेदः, तल्लक्षणम्-उदावर्तरजोऽजीर्णक्लिन्नकायनिरोधसमुद्भवोऽयम्, अन्धकारेण तमोगुणेन वाऽस्य वृद्धिः शीतैश्चास्य शान्तिः, तमसि मज्जन्तमिव स्वात्मानं मन्यते** ( चचि. १७.६३-६४; मा. श्वासनि. ) द्र० 'श्वास'

तमक श्वासाचा एक प्रकार. म्हातारपण, उदार्वतरोग, धूळ, अजीर्ण, मलमूत्रादि वेगांचे अवरोध यामुळे हा होतो. अंधेरात किंवा तमोगुणाने याची वृद्धि होते. थंड गुणाने हा शमतो. डोळ्यांपुढे सारखी अंधेरी येते.

**संतर्जक**–वि. **भयदर्शकः** ( चचि. ९.२० )
भीतिदायक. भीति दाखविणारा.

**संतर्पण**–वि., **तृप्तिकरम्, प्रीणनम्** ( सुसू. ४६.३४ )
तृप्ति करणारे, पोषक, पौष्टिक. पुष्टि वाढवणारे.

न., **उपक्रम० बृंहणम्** ( चसू. २३.३०; सुचि. २४.२६; अहृसू. १४.१ )
उपचार. पुष्टि वाढवणारे, पौष्टिक.

**पेय० द्राक्षादाडिमखर्जूरलाजाचूर्णादिसाधितं समधुघृतं पानकम्, तद्गुणाः–शीतं बल्यं रसायनं हृद्यं वीर्यवृद्धिकरं नेत्ररोगघ्नं च** ( ध. ७.४९; पृ. ३०५ )
एक पेय. द्राक्ष, डाळिंब, खजूर, लाह्या इत्यादी युक्त. मध व तूप घालून केलेले पेय. पन्हे. गुण— थंड, बलकर, रसादि धातूंचे परिपोषक हृदयाला हितकर, वीर्य वाढणारे व डोळ्याचे रोगनाशक.

**–निमित्त**–वि., **बृंहणहेतुकः ( स्थौल्यादिव्याधिः )** ( असंसू. ११.४७ )
पौष्टिक कारणे असलेला स्थूलता इत्यादी रोग.

**संतर्पणीय**–वि., **अध्यायसंज्ञा०** ( चसू. २३,१ )
अध्यायाचे नाव. पौष्टिकांसंबंधी विवेचन यात आहे.

**संतान**–पु., **तन्तुः** ( हे. ) **संततिः, सूत्ररूपता** ( अरु. अहृसू. २९.५८ )
संततिजन्य, आलेले तंतु, दोरा, धागा.

**–दोष**–पु., **मृतवत्सत्वादिविकारः** ( चसू. २६.१०३ )
संततीला होणारे रोग. मेलेले मूल होणे.

**संतानिका**–स्त्री., **क्षीरोपरिस्थः स्त्यानो भागः** ( चक. १.१७ ) **क्षीरजालिका** ( सुशा. ४.४ ) **क्षीरसरः** ( सुसू. ४५.९४ ) **द्र० 'दुग्धसंतानिका'**
दुधाच्या वरचा जाड, मऊ, स्निग्ध आवरण रूप आलेला भाग. साय, मलई.

**घृतोपरितनः स्त्यानो भागः** ( सुउ. ४५.१८ )
तुपाच्यावरचा जाड, मऊ, स्निग्ध आवरणरूप भाग, साय.

**व्रणबन्धनद्रव्येष्वेकम्, कुशलसंतानिका कोकिलवृत्तिर्द्वित्रितन्तुरचिता, मर्कटीवासमिति केचित्** ( ड. सुसू. १८.१६ )
व्रण बांधण्यास उपयुक्त पदार्थांपैकी एक. कोळ्याच्या जाळ्यासारखे विणलेले विरविरित वस्त्र.

**लूता० इयं वायवी, तद्दंशलक्षणानि–दंशे शूलः, अश्रुभिर्नेत्रपर्याकुलत्वम्, प्रदर आक्षेपको वातजा विकाराश्च** ( असंउ. ४५ )
वातप्रकृतीचा एक किडा. डसल्याची लक्षणे–दंशात शूल. डोळे अश्रुपूर्ण. प्रदर आंकडी व इतर वातज विकार.

**संतानी**–स्त्री., **लूता० संतानिका** ( असंउ. ४४ )
एक विषारी किडा.

**संताप**–पु., **लक्षण० तापः दैहिकमानसभेदात् द्विविधः शरीरस्यौष्ण्याधिक्यम् मनसो वैचित्त्यादिरूपा पीडा च** ( चचि. ३.३१; सुनि. १.३२ )
तापणे. ताप. शरिराचा व मनाचा असा दोन प्रकारचा. शरिराची उष्णता वाढणे व मन बेचैन होणे.

**अग्न्यादिभिर्दाहः यत्र पयोमांसरसो वा अनुपानत्वेन उपयोज्यः** ( सुसू. ४६.४२६ )
अग्नीने आग होणे. येथे दूध किंवा मांसरस द्यावा.

**तैजसभावः, औष्ण्यम्** ( सुशा. १.१९ )
तेजाचा गुण, उष्णता.

**–लक्षण**–वि., **संतापो लक्षणं यस्य सः ( ज्वरः )** ( चनि. १.३२ )
तापणे हे लक्षण ज्याचे आहे तो (ज्वर).

**संतेजन**–न., **उत्तेजनम् संदीपनम्** ( सुचि. ३४.१० )
उत्तेजित करणे, उद्दीपित करणे.

**संत्रस्तगोचर**–वि., **संत्रस्तविषयप्रचारम् ( सार्पसत्वम् )** ( चक. चशा. ४.३८)(४ )
त्रासदायक अशा स्थानात संचार करणारा. अडी-अडचणीतून मार्ग काढणारा. (हे सर्पजातीय प्रकृतीचे लक्षण आहे.)

**संदंश**–पु., **यन्त्र० सनिग्रहानिग्रहभेदात् स द्विविधः सनिग्रहः सवारङ्गो नापितस्येव लोहकारसंदंश इव कीलबद्धः, अनिग्रहस्तु सुवर्णकारस्येव, उभावपि षोडशाङ्गुलौ, त्वङ्मांससिरास्नायुगतशल्योद्धरणार्थमुपयुज्येते** ( सुसू. ७.११; असंसू. ३४.६; अहृसू. २५.७ )
चिमटा. एक यंत्र. मध्ये नियंत्रक खिळा असणारा सनिग्रह ( न्हाव्याजवळ व लोहाराजवळ असतो

तसा) खिळयाने युक्त नसलेला, अनिग्रह (सोनाराजवळ असतो तसा.) दोन्ही १६ अंगुळे लांब. त्वचा, मांस, शिरा, स्नायु यांत रुतलेले शल्य उपटून काढण्याकरिता उपयुक्त.

**अपरः संदंशः षडङ्गुलोऽर्धाङ्गुलविस्तृतो वक्रद्विबाहुरङ्गुष्ठाङ्गुलिप्रान्तसमागमाकृतिः सूक्ष्मशल्याक्षिपक्ष्म, व्रणाधिमांसाहरणार्थमुपयुक्तः** ( सुचि. १.१०४) असंसू. ३४.६; अहृसू. २५.८ )

दुसऱ्या प्रकारचा चिमटा. सहा अंगुळे लांब, अर्धा अंगुळ रुंद, दोन्ही दांडे वाकडे आंगठा व दुसरे बोट यांची टोके जोडली असता होणाऱ्या आकृतीसारखा सूक्ष्म शल्य, पापणीचे केस व जखमेत वरआलेले अंकुर काढण्याकरिता उपयुक्त.

**(संदंशी)**–स्त्री., रेवतीग्रह० **इयमसाध्या जातहारिणी** ( का. रेवतीक. )

एक रेवतीग्रह. जन्मतःच मुलाला मारणारी. ही असाध्य.

**संदानिका**–स्त्री., **वनस्पति० खदिरभेद० अरिः** ( रा. ८.४०; पृ. १२ ) द्र० 'खदिर' खैरप्रकार.

**संदिग्धनौ**–स्त्री., **शङ्क्यमानमज्जाना संशयिता नाम संकटस्पृष्टा नौका** ( हे. अहृसू. २.३५ )

बुडेल अशी शंका येणारी नाव. संकटात सापडलेली नाव.

**संदिग्धवाच्**–वि., **अव्यक्ता वाग् यस्य सः ( पुत्रः )** ( अरु. अहृसू. १३.७ )

अस्पष्ट बोलणारा (पुत्र).

**संदेहलक्षण**–वि., **संदेहोत्पादकः संदेहात्मकः** ( चवि. ८.४३ )

संशयोत्पादक. संशयात्मक.

**संधर्षा**–स्त्री., **वनस्पति० अलक्तकः** ( रापरि. ६.१२; पृ. ३४६ ) अळिता.

**संधातृ**–वि., **सम्–एकत्र धारयतीति संधातृ** ( चसू. २७.२४५ )

एकत्र धारण करणारा. एकत्र धरणारा.

**संधान**–वि., **संवट्टकम्** ( चसू. १.१०८ ) **भग्नसन्धानकरम्** ( सुसू. ४६.५१७; सुसू. १४.३९ )

जुळवणारा, सांधणारा, भंगलेले सांधणारा.

न., **व्रणस्य षष्ट्युपक्रमेष्वेकः, व्रणौष्ठादिसंयोजनम्** ( ड. सुचि. १.८ ) **रक्तस्तम्भनोपायेष्वेकः** ( सुसू. १४.३९ )

व्रणाच्या साठ उपचारांपैकी एक. जखमेचे ओठ एकमेकाशी सांधणे जुळणे. रक्त थांबवणाऱ्या उपायांपैकी एक.

**मद्यादेः उत्पादनम्** ( हे. अहृसू. २.४० )

दारूचे उत्पादन, निर्मिति, दारू करणे.

**संधिस्थानम्** ( सुशा. ६.२७ ) संधिस्थान.

**आसुत० मद्य** ( रा. १४.३०२ पृ. २५४ ) मद्य.

**काञ्जिकम्** ( र. ४.६४-६५ ) कांजी.

पु., **सन्धानीयो गणः, मधुमधुकपृश्निपर्णीकट्फललोध्रप्रियङ्गुधातक्यः । अंबष्टकीसमङ्गा मोचरसश्चेति संधानः ॥** ( असंसू. १५.१० )

मध, ज्येष्ठमध, पिठवण, कायफळ, लोध्र, गव्हला, धायटी, पहाडमूळ, लाजाळू, सावरीचा डिंक या औषधांचा गण हा व्रण सांधणाऱ्या म्हणजे भरून आणणाऱ्या औषधांचा गण होय.

**–कर**–वि., **सन्धानं कुर्वाणः ( कषायरसः )** ( चसू. २६.४३(६) )

सांधणारा. सांधा जुळवणारा, ( तुरट रस. )

**–कारिन्**–वि., **भग्नानां साधनः नाम सन्धायकः** ( अहृसू. ६.१६ )

सांधणारा, भंगलेले सांधणारा.

**–कृत्**–वि., **सन्धानं कुर्वाणम्** ( चसू. २७.२१ ) **श्लेषकरम्** ( अहृसू. १०.८ )

सांधणारा, जुळवणारा, चिकटविणारा.

**–विधि**–पु., **कर्णरोगे उपक्रम० आतुरे ग्रथितकेशान्ते बन्धनमुपधारितवति सति छेद्यभेद्यलेख्यैरुपपन्नैरुपपाद्य कर्णं, शोणितं दुष्टमदुष्टं वेति अवेक्षेत। ततो वातदुष्टे धान्याम्लोष्णोदकाभ्यां, श्लेष्मदुष्टे वारुणीसलिलाभ्यां प्रक्षाल्य पुनश्चावलिख्यानुन्नतमहीनविषमं सन्धिं निवेश्य ततो मधुघृताभ्यामभ्यज्य पिचुप्लोतयोरन्यतरेणावगुण्ठ्य सूत्रेण नातिगाढमशिथिलं च बध्वा सिराव्यधोक्तेन कपालस्य वा चूर्णेनावकीर्याचारिकमुपदिशेत्, संधिमश्लिष्यन्तं क्षौमसूत्रेण सीव्येत्,। अतिक्षीणपालिकं वा शोणिताक्तेन पिचुना वेष्टयेत्,। व्रणवच्चैनमुपाचरेत्,। त्र्यहाच्चतुरहाद्वा सलिलेन परिषिच्य पिचुं सूत्रं चापनयेत्, न चाशुद्धरक्तमतिप्रवृत्तरक्तं क्षीणरक्तं वा कर्णं संदध्यात्, तस्य हि स्वयमपि**

**संधिर्विश्लिष्यते, आध्मायते, श्यावतामुपैति, पच्यते, शुष्यति चिराद्रोहति रूढोप्याभरणं न क्षमते। किंच स सशोफकण्डूसन्तापो ग्रन्थिमांश्च भवति। तत्र च यथास्वं प्रतिकुर्वीत। दुष्टरक्ते च रक्त-मवसेचयेत् । क्षीणरक्तं स्नेहपाननस्यमांसरसा-शनाभ्यङ्गैर्बृंहयेत्। शोफरागादियुक्ते कर्णे सन्धानं नाचरेत्। तथाऽकृतवमनादिकस्य घस्मरस्य च सन्धानं नाचरेत्। अत्युष्णे देशे काले च सन्धानं नाचरेत्।** (असंउ. २२)

सांधण्याचा विधि–एक उपचार. रोग्याच्या कानाच्या वर केसांच्या शेवटी बांधलेला बंध तसाच ठेवून कानाला छेदणे, फोडणे, खरडणे यांपैकी योग्य तो विधि करून रक्त दुष्ट की शुद्ध पहावे. वातदुष्ट रक्त असल्यास कांजी व ऊन पाण्याने, कफाने दुष्ट असल्यास वारुणी दारू व ऊन पाण्याने धुऊन पुन्हा खरडून सांधा वर खाली किंवा वेडावाकडा न जोडता सारखा जोडून मध तूप यांनी माखून कापसाचा बोळा किंवा कापड यांनी गुंडाळून दोऱ्याने फार घट्ट नाही, ढिले नाही असे बांधून शिर तोडण्याच्या विधीत सांगितलेले सर्वही पुढचे उपक्रम करावेत किंवा खापराचे चूर्ण वर भुरभुरून व्रणोपचारात सांगितल्याप्रमाणे वागावे, संधि जुळत नसेल तर रेशमाच्या किंवा तागाच्या दोऱ्याने शिवावा. अतिक्षीण पाळी असेल तर रक्ताने माखलेल्या बोळ्याने वेष्टावे व व्रणाप्रमाणे उपचार करावे. तीन-चार दिवसांनी पाणी शिंपडून बोळा, कापड काढावे अशुद्ध रक्ताचा, रक्त क्षीण असलेला रक्तस्राव खूप झाला असेल तर कान सांधू नये, सांधला तर तो सांधा स्वतःच निखळतो, फुगतो, काळा होतो, पिकतो, सुकतो व फार दिवसांनी रुझून येतो, व रुझला तरी घातलेले दागिने तोलू शकत नाही. उलट सूज खाज दाह गाठी होतात तेव्हा योग्य उपचार करावेत. रक्त दुष्ट असेल ते काढावे. रक्त क्षीण असेल तर तूप पिणे, नाकात घालणे. मांसरस पिणे, अभ्यंग करणे इत्यादी पौष्टिक उपचार करावे. सूज लाली इत्यादी-युक्त कान सांधू नये. वांती इत्यादिकांनी शरीर शुद्ध केले नसल्यास, अधाशी रोगी असल्यास कान सांधू नये. अतीशय उष्ण देशांत व कांळातही कान सांधू नये.

**संधानीय**–वि., **संधानार्थं हितः, षट्के महाकषाय–वर्गे एको गणः** (चसू. ४.८) **तद्द्रव्याणि–मधुकमधु-पर्णीपृश्निपर्ण्यम्बष्ठकीसमङ्गामोचरसधातकीलोध्रप्रि-यङ्गुकट्फलानीति दश। द्रव्याणीमानि भग्नसन्धान-कारकाणि** (चसू. ४.९; असंसू. १५.१०)
सांधण्याकरिता हितकर एक गण. ज्येष्ठमध, गुळवेल, पिठवण, मयूरशिखा, लाजाळू, मोचरस, धायटी, रोध्र, गव्हला, कायफळ, ही दहा द्रव्ये भंग सांधणारी आहेत.

**संधारण**–न.; **शकृदादिवेगानां निरोधः** (चनि. ६.३)
मळमूत्रादि विसर्जन करण्याचे वेग अडवणे.

**संधाव**–पु., **उपक्रम० अञ्जनवदेवास्य क्रिया। स च संधावो नाम लोहपात्रे गोमूत्रघृष्टं घृतधूपितं ताम्रम् संधावाञ्जितं चक्षुर्दोषरहितं भवति** (असंउ. २०)
उपचार. अंजनासारखीच याची क्रिया. संधाव म्हणजे लोखंडाच्या भांड्यावर गोमूत्रात तांबे घासून तुपाच्या दिव्यावर धरून त्या दिव्याची काजळी त्यात मिसळून ते डोळ्यात घालावे. डोळा दोषरहित होतो.

**संधायसंभाषा**–स्त्री., **तद्विद्यसंभाषाभेदः तद्विधिः–ज्ञानविज्ञानवचनप्रतिवचनशक्तिसंपन्नेन अकोपनेना-नुपस्कृतविद्येनानसूयकेनानुनेयेनानुनयकोविदेन क्लेशक्षमेण प्रियसंभाषणेन च सह संधायसंभाषा विधीयते। तथाविधेन सह कथयन्विस्रब्धः कथयेत् पृच्छेदपि च विस्रब्धः पृच्छते चास्मै विस्रब्धाय विशदमर्थं ब्रूयात्, न च निग्रहभयादुद्विजेत निगृह्य, चैनं न हृष्येत्, न च परेषु विकत्थयेत, न च मोहा-देकान्तग्राही स्यात्, न चाविदितमर्थमनुवर्णयेत्, सम्यक्चानुनयेनानुनयेत् तत्रचावहितः स्यात्। इत्यनुलोमसंभाषाविधिः** (चवि. ८.१७)
तज्ज्ञांच्या विचारविनिमयातील (संभाषणातील) भेद. त्याचा विधि. ज्ञान कला-ज्ञान विधान करणे उत्तर प्रत्युत्तर देणे या बाबतीत समर्थ अशा कुशल व्यक्तीने न संतापता आपल्याला पूर्ण शास्त्र अवगत आहे अशी घमेंड न धरता मत्सरविरहित संभाषणाला अनुकूल भूमिकेने शांत शिष्टाचाराने वागण्याची कला जाणणाराने दुरुत्तराने होणारे क्लेश सहन करण्याच्या समर्थतेने गोड बोलण्याने संधाय–संभाषा होऊ शकते. या रीतीने सांगणारा निश्चित सांगतो, विचारणारा निर्भय वृत्तीने विचारतो व

त्या निर्भय विद्वानाला विधानाचा विशदार्थ विचारतो. पराभवाच्या भयाने उद्विग्न होत नाही, सांगणारा त्याच्या पराभवाने आनंदित होत नाही. दुसऱ्याजवळ बढाई मारीत नाही. मोहाने एका टोकाला जात नाही. माहित नसलेला अर्थ सांगत नाही. प्रेमाने योग्य असा अर्थ सांगतो. हे लक्ष्यात असू द्यावे. हा अनुकूल संभाषाविधि होय.

**संधि**–पु., ऋतुसंधिः ( अहृसू. १३.३५ )
सांधा. दोन ऋतूंचा खांधा, संधिकाल. अगोदरच्या ऋतूचा शेवटचा व पुढील ऋतूचा आरंभाचा आठवडा ऋतुसंधि.

शारीर० **अस्थिसंयोगस्थानम्** ( चशा. ७.१४ ) **मज्जावहानां स्रोतसां मूलम्** ( चवि. ५.८ ) **द्विविधाः संधयः–चेष्टावन्तः स्थिराश्च, शाखासु हन्वोः कट्यां च चेष्टावन्तः, शेषाः संधयः स्थिराः, द्विविधा अपि कोरोलूखलसामुद्गप्रतरतुन्नसेवनी-वायसतुण्डमण्डलशङ्खावर्तभेदादष्टविधाः, तेषा-मङ्गुलिमणिबन्धगुल्फजानुकूर्परेषु कोराः, कक्षा-वङ्क्षणदशनेषूलूखलाः, अंसपीठगुदभगनितम्बेषु सामुद्गाः, ग्रीवापृष्ठवंशयोः प्रतराः, शिरःकटी-कपालेषु तुन्नसेवन्यः, हन्वोरुभयतो वायसतुण्डाः, कण्ठहृदयनेत्रक्लोमनाडीषु मण्डलाः, श्रोत्रशृङ्गाटकेषु शङ्खावर्ताश्च** ( चशा. ५.२७ ) **संधिसंख्या–द्वे संधिशते** ( चसशा. ७.१४ ) **काश्यपसंहिताया-मेकाशीत्यधिकत्रिशतसंधयः उक्ताः** ( का. शा. ) **सुश्रुते दशोत्तरे द्वे संधिशते** ( सुशा. ५.२६; अहृशा. ३.१६ ) **तद्विभागः–शाखास्वष्टषष्टिः, कोष्ठे एकोनषष्टिः, ग्रीवां प्रत्यूर्ध्वं च त्र्यशीतिः, एवं मिलित्वा दशोत्तरद्विशतम्। तत्रैकैकस्यां पादाङ्गुल्यां त्रयस्त्रयः, द्वावङ्गुष्ठे, जानुगुल्फ-वङ्क्षणेष्वेकैकः, एवं प्रतिशाखं सप्तदश, मिलित्वा शाखास्वष्टषष्टिः सन्धयः, त्रयः कटीकपालेषु, चतुर्विंशतिः पृष्ठवंशे, चतुर्विंशतिः पार्श्वयोः, उरसि चाष्टौ मिलित्वा कोष्ठे एकोनषष्टिः, अष्टौ ग्रीवायाम्, त्रयः कण्ठे, हृदयक्लोमनिबद्धासु नाडीष्वष्टादश, दन्तमूलेषु द्वात्रिंशत्, एकः काकलके, एको नासायाम्, द्वौ वर्त्ममण्डलयोर्नेत्राश्रयौ, गण्ड-कर्णशङ्खेषु षट्, द्वौ हनुसंधी, द्वौ भ्रुवोरुपरि-ष्टात्, द्वौ शङ्खयोरुपरिष्टात्, पञ्च शिरःकपालेषु, एकश्च मूर्ध्नि, एवं मिलित्वा ग्रीवां प्रत्यूर्ध्वं त्र्यशीतिः** ( सुशा. ५.२४-२७ )



शरिरातला सांधा. दोन अस्थि एके ठिकाणी संयुक्त होतात, ते स्थान. मज्जावह स्रोतसांचे मूल स्थान. प्रकार दोन— हालचाल करणारे व स्थिर. हातपाय, हनुवटी, कंबर यात हालचाल करणारे व बाकीचे सर्व स्थिर त्यांचे पुन्हा आठ प्रकार. १ कोर ( खळगा ) २ उलूखल ( उखळ ) ३ समुद्ग ( संपुट ) ४ प्रवर ( किंचित हलणारे ) ५ तुन्न सेवनी ( एक-मेकात गुंतवून शिवलेली शिवण ) ६ वायसतुंड ( कावळ्याच्या चोची सारखे ) ७ मंडल ( गोल मंडलाकृति)८ शंखावर्त (शंखातल्या वेटोळ्या सारखे) १ अंगुळी, मनगट, घोटा, गुडघा, कोपर यात खळग्याच्या आकाराचे ( कोर ) २ काख, जांघ, व दात यात उखळासारखे ( उलूखल ) ३ अंसफलक, गुद, योनी, ढुंगण, यात संपुटासारखे (सामुद्ग) ४ मान व पाठीचा कणा यात प्रवर ५ डोक्याच्या व कंबरेच्या पसरट हाडात शिवल्यासारखे ( तुन्न-सेवनी ) ६ हनुवटीच्या दोन्ही बाजूस कावळ्याच्या चोचीसारखे ( वायसतुंड ) ७ घसा, हृदय, डोळा व क्लोमनाडीला वाटोळे ( मंडल ) ८ कान व शृंगा-टकांत शंखाच्या वेटोळ्यासारखे ( शंखावर्त ).

**संधिसंख्या**— चरक दोनशे कश्यप ३८१ व सुश्रुत २१० संधि सांगतात. सुश्रुताने सांगितलेले संधि— हातापायात ६८, कोठ्यात ५९ मानेच्यावर ८३ मिळून २१० होतात. ते पुन्हा पायांच्या एकाएका अंगुळीत ३|३ आंगठ्यात २।२, गुडघा, घोटा, जांघ, यात एक एक, या प्रमाणे प्रत्येकी १७ असे दोन हात व दोन पाय मिळून ६८, कमर व कपाळात ३, पृष्ठवंशात २४, दोन्हीकडे फासळ्यात २४, छातीत ८ मिळून कोठ्यात ५९, मानेत ८, कंठात ३,हृदय व क्लोमाशी संबद्ध नाड्यांमध्ये १८, दंतमूळ ३२, घशातील घाटा १ नाकात १ डोक्याच्या पापण्या-मध्ये २ गाल, कान, कानशील ६, हनुवटीचे संधी २ भुवयांच्यावर २ कानशिळाच्यावर २ डीके व कपाळ ५ डोक्यावर १ मिळून मानेवरचे ८३ अशी ही संख्या आहे.

**–च्युति**–स्त्री., वातरोग० **संधीनां च्युतिर्विश्लेषः** ( चचि. २८.७२ )
सांधा निखळणे. एक वातरोग.

**–जा**–स्त्री., वनस्पति० **त्रिसंधिः** ( रापरि. १०.३७; पृ. ३७१ )
तिरसंदी.

**–दग्ध**–न., उपक्रम० अग्निकर्म, संधेर्दाहः । तल्लक्षणम्–रूक्षारुणता, कर्कशस्थिरव्रणता च (सुसू. १२.८)

उपचार. डाग देणे. संधीवर डाग देणे. **लक्षण**— रुक्ष लालसर रंग खरखरित व स्थिर जखम असणे.

**–नाल**–पु., भैषज्य० नखम् (रा.१२.१०८. पृ. १०७)

नखला.

**–पीडा**–स्त्री., संधेः संधौ वा पीडा (अहसू. १७.१६)

सांध्यात वेदना.

**–बन्ध**–पु., सुश्लिष्टसंधित्वम् (हे. अहसू. ११.३)
सांधे व्यवस्थित उत्तम बांधीव असणे.

**–भग्न**–न., अत्र भग्नपदं 'नपुंसके भावे क्तः' इतिसूत्रेण भावार्थकं ज्ञेयम् । भग्नप्रकारः, संधिभङ्गः, उत्पिष्टविश्लिष्टावक्षिप्तातिक्षिप्ततिर्यक्क्षिप्तविवर्तितभेदात् षड्विधं तत् (असंउ. ३२)

सांधा निखळणे. प्रकार सहा. (१) दोन्ही हाडांच्या टोकांचे चूर्ण होणे. (२) टोके जोराने घासणे (३) दोघांची टोके एकमेकांच्या बाजूला जाणे (४) खालच्या हाडाचे टोक खाली सरकणे (५) हाडाचे टोक दूर जाणे. (६) एका हाडाचे टोक दुसऱ्याच्या बाजूला जाणे.
यांना क्रशः उत्पिष्ट, विश्लिष्ट, अतिक्षिप्त, अवक्षिप्त, तिर्यक्क्षिप्त, आणि विवर्तित म्हटले आहे.

**–मर्मन्**–न., मर्म० संधिबाहुल्यात्संधिमर्म, संधिमर्माणि विंशतिसंख्याकानि । द्वे जानुनी, द्वौ कूर्परौ, पञ्च सीमन्ताः, एकोऽधिपतिः, द्वौ गुल्फौ, द्वौ मणिबन्धौ, द्वौ कुकुन्दरौ, द्वावावर्तौ, द्वे कृकाटिके च (सुशा. ६.७; असंशा. ७.२९; अहशा. ४.४४-४५)

सांध्यातली मर्मस्थाने, यात सांधा मुख्य म्हणून संधिमर्म म्हणतात. संख्या २० दोन गुढघ्यात, २ कोपरात, पाच शिवण्यात, एक अधिपति, (डोक्यातील शिरांचा समुदाय) दोन घोट्यात दोन मनगटात, दोन कमरेच्या मागे पाठीच्या कण्याच्या दोन्ही बाजूला, कुकुंदर, भुवईच्या वर खोलगट भागातले आवर्त दोन. डोके व मान यांच्या सांध्यावर दोन कृकाटिका,

**–महारुज्**–वि., लक्षण० संधिषु महती पीडा यस्य सः प्रभूतनसन्धिरेकः (चसू. १३.४८)
ज्याच्या सांध्यात मोठी वेदना होते तो.

**–मुक्त**–न., रोग० संधिभङ्गः– (इंदु.) द्वयोरस्थ्नोः संधानस्य विश्लेषः (सुनि. १५.४)
सांध्याचा भंग. दोन्ही हाडांचा सांधा निखळणे.

**–मोक्ष**–पु., संधेश्चलनप्रसारणादिक्रिया (काखिल. १०.१६४)
सांध्याचे चलवलन पसरणे इ० क्रिया.

**–रुज्**–स्त्री., रोगलक्षण० संधीनां वेदना (सुउ. ३९.३६)
सांध्यातील वेदना.

**–लेपन**–न., मूषातदाच्छादनयोर्लेपनेन बन्धः (र.९.८)
मूस व तिचे झाकण यांचा सांधा लेप लावून बंद करणे.

**–वल्ली**–स्त्री., वनस्पति० त्रिसंधिः (रापरि. १०.३७; पृ. ३७१)
तिरसंदी.

**–विक्रिया**–स्त्री., लक्षण० संध्यस्थ्नोर्मध्यनिम्नत्वम् (सुनि. १५.७)
सांधा व हाड यांच्यामध्ये खळगा पडणे.
**संधिस्थाने विषमाङ्गता** (इन्दु.)
सांध्यात वेडेवाकडेपणा होणे.

**–विद्ध**–वि., संधौ विद्ध आतुरः, तल्लक्षणानि–शोफातिवृद्धिः, तुमुलारुजो बलक्षयः पर्वसु भेदशोफौ संधिकर्मोपरतिश्च (सुसू. २५.३८)
संधीवर आघात होऊन तो फुटणे या लक्षणांचा (रोगी.) सूज फार वाढणे, अतिशय वेदना, बलक्षीणता, पेऱ्यात सूज व फुट लागणे हे उपद्रव त्याला होतात व सांध्याची हालचाल बंद होते.

**–विमोक्ष**–पु., लक्षण० संधिभग्नम्, संधिमुक्तम् (सुचि. ३.५०)
सांधा निखळणे, मोकळा होणे. अलग होणे.

**–विश्लेष**–पु., संधिविस्रंसनम् (सुनि. १५.७)
सांधा निखळणे, ढळणे, अलग होणे.

**–विश्लेषण**–न., लक्षण० संधिच्युतिः (चचि. २१.३०)
सांधा निखळणे, ढळणे, अलग होणे.

**–वेदना**–स्त्री., संधीनां संधिषु वा व्यथा (अहसू. ११.१८)
सांध्यात वेदना होणे.

**-शब्दगामिन्**-वि., संधिस्फुटनशब्दवान् ( पुरुषः ) ( चवि. ८.९८ )
चालताना ज्याच्या सांध्यात कटकट शब्द होतो तो. वातप्रकृतीचे लक्षण.

**-शूल**-पु., रोग० संधिषु शूलवद्वेदना ( चचि. २८.३३ ) मध्यममार्गजोऽयम् ( धसू. ११.४९ )
सांध्यात शूल, टोचल्या सारखी पीडा होणे. मध्यम मार्गातील विकार.

**-संश्लेष**-पु., संधीनां बन्धः ( अहृसू. १२.१८ )
संधिबंधन.

**-संश्लेषण**-न., संधिबन्धनम् (सुसू. १५.४)
संधिबंधन.

**-स्थैर्य**-न., संधीनां स्थिरता ( सुचि. ३.९ )
संधि स्थिर असणे.

**-स्फुटन**-न., संधिगतः स्फुटनात्मकः शब्दः ( चवि. ४.७ )
सांध्यात कटकट शब्द होणे.

**संधिक**-पु., रोग० संनिपातज्वरः तल्लक्षणानि- शूलं शोषो वातवेदना श्लेष्महानिर्बलहानिर्जागरणं च। अस्य मर्यादा सप्तवासराः, साध्योऽयम् ( माज्वर. ९ ) द्र० 'ज्वर'
त्रिदोषज ज्वर, दोषी ताप. **लक्षणे**— शूल, शोष, वाताच्या वेदना, कफ क्षीणता, बलनाश, व जागरण. मर्यादा— सात दिवस. हा साध्य असतो.

**संधीयमान**-वि., एकीक्रियमाणम् ( चवि. ६.३ )
एक करावयाचे, एकीकरण करावयाचे.

**संधुक्षण**-न., दीपनम् ( अहृसू. ८.२० )
( अग्नि ) प्रदीप्त करणे.

**संधुक्ष्यमाण**-वि., उद्दीप्यमानः प्रज्वाल्यमानः ( अहृसू. १८.३० )
प्रदीप्त होत असलेला. उद्दीपित होत असणारा.

**संध्यन्त** पु., संधिसमीपगः प्रदेशः ( सुचि. ३.५३ )
सांध्याच्या जवळचा ( भोवतालचा ) भाग.

**संध्यस्थिशूल**-न., लक्षण० संध्यस्थिषु शूलवत्पीडा ( चचि. ३.३९-४० )
सांध्यात आणि हाडात शूल होणे.

**संध्यापुष्पा**-स्त्री., वनस्पति० जाती ( रा. १०.२३१; पृ. २९८ )
जाई.

**संध्याभ्र**-न., खनिज० सुवर्णगैरिकम् ( रा. १३.२३३; पृ. १२९ )
सोनकाव. सोनागेरू.

**संध्याराग**-न., खनिज० सिन्दूरम् ( रा. ११.१६१; पृ. ११६ )
शेंदूर.

**सन्न**-वि., अभिघातादिभिरन्तःप्रविष्टम् ( सुचि. ३.४३ ) अधःस्रुतम्, अधःप्रविष्टम् ( सुचि. ३.३६ )
आघातादींमुळे आत शिरून दबलेले नाक किंवा नाकपुडी.
सरकलेले, खाली शिरलेले, खाली स्रवणारे.

**-कटि**-वि., लक्षण० शिथिलकटिः कटिस्रंसवान् ( सुउ. ४०.९ )
ढिली कंबर असलेला. कंबर गळाल्यासारखी वेदना होत असलेला.

**संनिकर्ष**-पु., सान्निध्यम्, नैकट्यम् ( सुशा. ९.३ )
सांनिध्य, निकटता.

**-जा**-वि., आत्ममनइन्द्रियार्थेतिचतुष्टयसंबन्धेन सञ्जाता ( बुद्धिः ) ( चसू. ८.१२ )
आत्मा, मन, इंद्रिये, इंद्रियार्थ या चोहोंच्या परस्पर संपर्कामुळे उत्पन्न झालेली बुद्धि.

**संनिकृष्टवृत्ति**-वि., समीपवर्तिविषयग्रहणशीलम्, घ्राणं रसनं त्वगिति च संनिकृष्टवृत्तीनि ( का. शा. )
सांनिध्यात ( जवळ ) असलेल्या विषयाचे ग्रहण करण्याचा स्वभाव. नाक, जीभ व त्वचा ही इंद्रिये सांनिध्यातील विषयांचे ग्रहण करण्याच्या स्वभावाची आहेत.

**संनिधान**-न., निकटत्वम् (अरु. अहृसू. ७.५१ )
निकटता, सांनिध्य, जवळीक.

**संनिपतित**-वि., एकत्र संगतम् संनिपातं प्राप्तम् ( चचि. ३.२८५-२८६ )
एकत्र आलेले, एकत्र मिसळलेले.

**संनिपात**-पु., त्रयाणां कुपितानां वातादिदोषाणामेकस्मिन्नधिष्ठाने मेलनम् (चवि. ६.११) त्रिदोषाणां युगपत् प्रकोपः (चसू.१७.४१) प्रकृतिसमसमवेतज्वराद्यारम्भकदोषत्रयप्रकोपः ( ड सुचि. ३५.६ ) दशधाऽसौ ( असंसू. १.३० ) संनिपातो दुश्चिकित्स्यानां श्रेष्ठः ( चसू. २५.४० ) त्रयाणां वृद्धानां क्षीणानां वा दोषाणां संयोगः ( अहृसू. २१.१ )

वातादि तिन्ही कुपित किंवा क्षीण दोषांचे एकाच स्थानात एकीभवन–मीलन. तिन्ही दोषांचा एकदम प्रकोप. दहा प्रकारचा. उपचार करण्याला कठीण असणाऱ्या रोगात हा श्रेष्ठ. दोषानुरूप चिन्हे असणारा संनिपात ज्वरातील दोष प्रकोप.

**संयोगः** ( सुशा. १.१६ ) **अत्यन्तमिश्रीभावः परस्परमिश्रणम्** ( सुशा. ६.१५; असंसू. १.३० ) एकजीव होईल असे मिश्रण, परस्पर मिश्रण.

**–कुठार**–पु., पारदयोग० **नागं वङ्गं पारदं जेपालं गन्धकं ताम्रं वत्सनाभं चेति समभागमेकत्रार्द्रक-निर्गुण्डीचाङ्गेरीरसैः क्रमेण मर्दयित्वा साधितोऽयं रसः, रसोऽयं संनिपातनाशनः** (र.१२.१४०-१४१) पाऱ्याचा योग. शिसे, कथील, पारा, जयपाळ, गंधक तांबे, बचनाग, समभाग घेऊन आले, निर्गुंडी, चुका यांच्या रसात खल करावा. हा रस संनिपातनाशक आहे. धातूंची भस्मे घ्यावी.

**–कुष्ठघ्न**–पु., पारदयोग० **तीक्ष्णलोहाभ्रकयोर्गोलकं गन्धके परिपाच्य तेन सार्द्धं हरितालमाक्षिकविशालाचित्रकबोलपाठाजटामांसीवत्सनाभशृङ्गीटङ्कणमधुयष्टीसिन्दुवाराणां चूर्णं मिश्रयित्वाऽऽर्द्रकरसेन च संमर्द्य बदरप्रमाणा गुटिकाः कुर्यात्। रसोऽसौ संनिपातकुष्ठनाशनः** ( र. २०.१६-१८ ) पाऱ्याचा एक योग. पोलाद, अभ्रक यांच्या भस्माचा गोळा गंधकात पचवावा. त्याबरोबर हरताळ, सुवर्णमाक्षिकभस्म, कवंडळ, चित्रक, बोळ, पहाडमूळ, जटामांसी, बचनाग, काकडशींगी, टांकणखार, ज्येष्ठमध, निर्गुंडी, यांचे चूर्ण मिसळून आल्याच्या रसात खलून बोराएवढ्या गोळ्या कराव्या. हा रस संनिपात कुष्ठनाशक आहे.

**–गजाङ्कुश**–पु., पारदादियोग० **पारदगन्धकताम्राभ्रकभस्मानि तथा लाङ्गलीचित्रकहिङ्गुवन्ध्याकर्कोटीपटोलनिर्गुण्डीसुगन्धारास्ना निम्बपल्लवाः, पाठा, क्षारत्रयं, क्ष्वेडं, बोलो, धत्तूरस्तण्डुलीयकं शृङ्गी मधूकसारं चेति जम्बीराम्लेन मर्दयित्वा सिद्धो रसः। अयं संस्वेददाहाभिन्यासघ्नः** (र. १२.१०१-१०३) पाऱ्याचा एक योग. पारा, गंधक, तांबे, अभ्रक भस्म, तसेच कळलावी, चित्रक, हिंग, वांझकर्टोली, पडवळ, निर्गुंडी, सुगंधी वाळा, रास्ना, तेल्याकंद, निंबाची पाने, पहाडमूळ, तिन्ही क्षार, गोड तेल्याकंद, बोळ, धोतरा, तांदूळजा, काकडशिंगी ज्येष्ठमधाचा शिरा. निंबूच्या रसात खलावा, याचे सेवन केल्याने खूप घाम येणारा, आग होणारा अभिन्यास संनिपात नाहीसा होतो.

**–ज**–वि., **त्रिदोषकोपजन्यः** ( ज्वरादिर्व्याधिः ) ( चचि. ३.८९९० ) त्रिदोषांच्या प्रकोपामुळे होणारा ( ज्वर, इत्यादी रोग ).

**–ज्वराकृति**–स्त्री., लक्षण० **संनिपातज्वरलक्षणम्** (चचि., ३.१०३-१०९ ) त्रिदोषज–दोषी ज्वराचे लक्षण.

**–विसर्प**–पु., रोग० **त्रिदोषजविसर्पः तल्लक्षणम्–सर्वायतनसमुत्थः सर्वलिङ्गव्यापी सर्वधात्वनुसार्याशुकारी महात्ययिकश्चाचिकित्स्योऽयम्** ( चचि. २१.४२ ) त्रिदोषाने झालेला विसर्प. **लक्षण**– तिन्ही दोष प्रकोपक कारणांनी झालेला, सर्व चिन्हे असलेला सर्व धातूत पसरलेला फार विघातक व उपचारांना मुळीच दाद न देणारा आहे.

**–हन्**–पु., वनस्पति० **किराततिक्तः नेपालनिम्बः, निद्रारिः** ( रा. ९.५२ ) **गुणाः–तिक्तः, शीतोष्णः, लघुः, योगवाही, अतिकफपित्तास्रशोथतृष्णाज्वरापहः** ( रा. ९. ५३ ) एक प्रकारचा काडेचिराईत. झोपेचा शत्रु. गुण– कडु, थंड व उष्ण ( सम ) हलका, योगाचे गुण वाढविणारा, अतिशय कफपित्त, रक्तदोष, सूज तहान, तापनाशक.

**वनस्पति० किराततिक्तः** ( ध. १.३५; पृ. १४ ) काडेचिराईत.

**संनिपाताञ्जनरस**–पु., पारदयोग० **निस्त्वग्जेपालजं बीजं दशनिष्कं मरिचं पिप्पलीसूतश्चैते प्रत्येकं निष्कं सर्वमेकत्र जम्बीररसेन सप्ताहपर्यन्तं मर्दनेन सिध्यत्ययम्। रसोऽयमञ्जनेन संनिपातज्वरहरः** (र. १२.११७-११८) पाऱ्याचा योग. जयपाळाचा मगज. दहा तोळे व मिरे, पिंपळी, पारा ही प्रत्येकी एक तोळा सर्व एकत्र लिंबाच्या रसात एक आठवडा खलावा. याच्या अंजनाने सनिपात ज्वर जातो.

**संनियोग**–पु., तन्त्रयुक्ति० **सं-नियोगो नामावश्यानुष्ठेयतया विधानम्। यथा–'न त्वया स्वेदमूर्च्छापरीतेनापि पिण्डिकैषा विमोक्तव्या' इत्यादि आज्ञापनं रोगिणे** ( चसि. ९२,४४ )

एक तंत्रयुक्ति. ज्याचे पालन अवश्य केले पाहिजे असे विधान. जसे जेंताक स्वेद घेणाऱ्या रोग्यास घामाच्या खोलीत असताना " घाम येऊन मूर्च्छा जरी तुला आली तरी कट्टा केव्हाही सोडू नकोस " अशी सूचना दिलेले वाक्य.

**संनिरुद्ध**-वि., **प्रतिरुद्धम्, अवरुद्धम्** (सुनि. १३.५६) अडवलेले, बंद झालेले, मार्ग बंद झालेले, वेष्टलेले, वेढलेले, अवरोध असलेले.

**-गुद**-पु., **क्षुद्ररोग० तत्संप्राप्तिलक्षणे-वेगसंधारणाद्विहतो वायुर्गुदमाश्रितः सन् निरुणद्धि, ततो महास्रोतः सूक्ष्मद्वारं करोति, तस्य ( नरस्य ) मार्गस्य सौक्ष्म्यात्कृच्छ्रेण पुरीषोत्सर्गो भवति। कालभेदात्सहजजातोत्तरेति द्विविधः, स्थानभेदाच्च गुदविवरे गुदमार्गचर्मसंकोचाद्गुदद्वारे चर्मसंकोचाद्भवति द्विविधः** ( सुनि. १३.५५.५६ )

एक रोग. बंद झालेले गुदद्वार. **संप्राप्ति व लक्षणे**— स्थानाच्या दृष्टीने दोन प्रकार. मलमूत्रांच्या विसर्जनाचे वेग अडल्यामुळे वायु गुदात प्रकुपित होऊन तेथेच राहून विकार करतो, गुदमार्ग अडवतो, मोठ्या आतड्याचे द्वार संकुचित करतो मलविसर्जनाचा रस्ता व दार बारीक झाल्याने मळ मोठ्या कष्टाने बाहेर पडतो. काळाच्या दृष्टीने दोन प्रकार—जन्मतः असलेले व नंतरचे.

**-गुदजठर**-न., **उदररोग० बद्धगुदोदरम्** ( सुसू. २३.८ ) **द्र० ' उदररोग '**

उदररोग. गुद व गुदद्वार बंद झाल्याने होणारा उदररोग.

**-गुदयन्त्र**-न., **यन्त्र० संनिरुद्धगुदाख्यव्याधिहरं नाडीयन्त्रम्** ( सुसू. ७.१३ )

बंद झालेले गुद या विकाराचे हरण करणारे पोकळ यंत्र. ( नळी )

**संनिरोध** -पु., **सम्यगवरोधः** ( सुक. २.३९ ) पक्का अडथळा. मार्ग बंद होणे.

**संनिवार्य**-वि., **निवारणीयम्, चिकित्स्यम्** ( सुउ. ४८.१७ )

निवारण होण्यासारखे, उपचार करण्यास हरकत नसलेले. उपचारास योग्य.

**संनिवेश**-पु., **तत्तत्स्थाने यथावदवस्थितिः** ( सुशा. २. ५६ ) **संस्थानम्** ( सुसू. २२.४ ) **संस्थापनम्** ( सुचि. ७.३० )

त्या त्या ठिकाणी योग्य ते असणे. स्थिति, असणे, स्थापना.

**संनिहित**-वि., **सम्यगवस्थितः** ( सुउ. ४७.८ ) चांगले ठेवलेले, व्यवस्थित ठेवलेले.

**संन्यस्त**-वि., **संन्यासरोगातुरः** ( सुउ. ४६.२०-२१ ) संन्यास रोगाने ग्रासलेला. मूर्च्छेसारख्या पण त्वरित मारणाऱ्या रोगाने ग्रासलेला.

**-संज्ञ**-वि., **रोग० संन्यासः** ( सुउ. ४६.२०-२१ ) संन्यास नावाचा रोग.

**संन्यास**-पु., **रोग० तत्संप्राप्तिः-मलिनाहारस्य रजोमोहावृतस्य नरस्य कुपिता अतिबला मलाः प्राणायतनसंश्रिताः सन्तो रक्तरस-संज्ञावहानि स्रोतांसि प्रतिहत्य वाग्देहमनसां चेष्टामाक्षिप्य दुर्बलं जन्तुं संन्यस्यन्ति** ( चसू.२४.२५-२७,४२;असंनि.६.१५) **तल्लक्षणम्-तमसोऽतिरेकात्प्रभूतदोषाच्च संमूर्च्छितः न्यासातुरो नैव संज्ञां लभते** ( सुउं. ४६.२० ) **तदसाध्यलक्षणम्-तीक्ष्णाञ्जनादिभिरलब्धसंज्ञ आनाहलालाश्वसनयुक्तश्चाऽऽतुरो वर्ज्यः** ( सुउ. ४६.२२-२३ ) **अयं मदमूर्च्छादिवद्गतेषु वेगेषु नोपशाम्यति किन्तु चिकित्सापेक्षा वर्तते** ( असंनि. ६.३६ ) **तच्चिकित्सासूत्रम्-तीक्ष्णाञ्जनान्यवपीडा धूमाः प्रधमनानि सूचीभिस्तोदनं दाहो नखान्तरे पीडा लोमकेशानां लुञ्चनमात्मगुप्तावघर्षादिश्च एतैः प्रबुद्धसंज्ञे लघ्वन्नैर्विस्मापनैः श्रुतिप्रियगीतवादित्रादिशब्दैः स्रंसनोल्लेखनैः शोणितावसेकाद्युपायैरस्य मनः प्रलयहेतुतो रक्षितव्यम्** ( चसू. २४.४२-५३ )

संन्यासरोग. मूर्च्छेसारखा दिसणारा पण अतिशीघ्रतेने मारणारा रोग.

रज व तम दोषांनी युक्त अशा मनुष्याने नित्य घाण पदार्थयुक्त अन्न सेवन केल्याने प्रकुपित झालेले अतिबलवान दोष (मळ) प्राणाचे घर – हृदय यात येऊन रस व संज्ञावाही स्रोतसेही बिघडवून काया, वाचा व मन यांच्या क्रिया बंद करून त्या दुर्बल मनुष्याला मृतवत् करतात.

**लक्षण**— तमोगुण अति वाढून विपुल दोषांमुळे मूर्च्छित रोगी शुद्धीवर येतच नाही.

**असाध्यलक्षण**—तीक्ष्ण अंजने हुंगवण्याची नाकातली औषधे यांनीही शुद्धि येत नसलेला पोटफुगी, लाळ गळणे, श्वास लागलेला, रोगी सोडावा.

हा रोग माज, मूर्च्छा इत्यादी रोगाप्रमाणे आपोआप थांबत नाही, **उपचारसूत्रे**–तीक्ष्ण अंजने, नाकात तीक्ष्ण औषधे घालणे, उयांनी टोचणे, डाग देणे, नखामध्ये टोचणी, केश, लव उपटणे, खाजकुहली अंगावर टाकणे, या उपायांनी शुद्धीवर आल्यावर हलका आहार, ओकारी, रेचक, रक्तस्राव करून तसेच आश्चर्योत्पादक, कानाला गोड लागणारी गाणी, वाद्ये यात त्याचे मन रिझवून नाशकर कारणापासून त्याचे रक्षण करावे.

**कर्मत्यागः** (चशा. १.१५४) कर्मांचा त्याग. सन्यास.

**संस्कार० औषधयुक्तस्य मृद्भाण्डरुद्धस्य पारदस्य मन्दाग्नि युताया चुल्ल्यामध्ये स्थापनम्** (र. ८.९७) **शोधनसंस्कारेऽस्यान्तर्भावः** (र. ८.९७)

पाऱ्याचा एक संस्कार, मातीच्या भांड्यात विशिष्ट औषधानी युक्त पारा ठेवून बंद करून मंदाग्नीवर ठेवणे. रोधनसंस्कारात याचा अंतर्भाव होतो.

**सपिण्डक**–पु., **भक्ष्य० मधुक्रोडः सपिष्टकपिण्डकः** ( चक्र. चसू. २७.२६७ )

ज्याच्या मध्य भागात गोड पदार्थ आहे असा. गूळ घातलेली, केशर इत्यादींनी सुगंधी केलेली अशी पुरी. सारण घातलेली साटोरी, सांजोरी.

**सपीतक**–वि., **ईषत्पीतवर्णम्** (सुउ. २४.७)

थोडे पिवळे, फिकट पिवळे, पिवळ्या छटेचे.

**सप्त**–वि., **सङ्ख्या०** ( सुचि. ९.१८ ) सात.

**–कृत्वस्**–अव्य., **सप्तवारम्** (सुचि. ९.१८) सात वेळा.

**–च्छद्**–पु., **वनस्पति० सप्तपर्णः** ( चचि. ७.६५; सुसू. ३९.४; ध. ३.८०; पृ. ११२ )

सप्तपर्णी, सातवीण.

**–च्छद्त्वच्**–स्त्री., **सप्तपर्णस्य वल्कलम्** ( सुक. १.४८ ) सातविणीची साल.

**–पत्र**–पु., **वनस्पति० मुद्गरः** ( रापरि. १०.२१; पृ. ११२ )

वाटोळ्या अतिशय वासाच्या फुलांची व खोडालाही वास असलेली वनस्पती.

**–पर्ण**–पु., **वनस्पति० कुष्ठघ्नगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.११; असंसू. १५.१८ ) **उदर्दप्रशमनगणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१७ ) **मूलमस्य वमनोपयोगि** ( असंसू. १४.३ ) **त्वगस्य व्रणे लेपार्थमुपयुज्यते** ( असंसू. ३८.५४; अहृसू. २९.७६ ) **क्षीरमस्य विरेचनोपयोगि** ( असंसू. १४.४ ) **वृक्षोऽयं क्षारोपयोगी** ( सुसू. ११.११ ) **अयं शाल्मलिसदृशपर्णो गजमदगन्धपुष्पः शरदि विकसनशील उच्चवृक्षः** ( सुसू. ३८. ६-७ ) **तद्गुणाः–तिक्त उष्णो हृद्यो दीपनः सरस्त्रिदोषघ्नः शूलगुल्म–क्रिमिकुष्ठकण्डूव्रणरक्तामयघ्नश्च** (ध. ३.८०; पृ.११२) **विषहरो मेहज्वरनाशनश्च** ( सुसू. ३८.६-७ ) **सातवन इति लोके**

सातविण वृक्ष. सावरीच्या पानासारखी पाने असलेला अगदी उंच शरद ऋतूत फुलणारा फुलांना हत्तीच्या मदासारखा वास असलेला वृक्ष. याचे मूळ वांती करता, दूध रेचकाकरिता, साल लेपाकरिता व सर्व वृक्ष क्षाराकरिता उपयुक्त. कुष्ठघ्न व अंगावरची चकंदळे नाहीशी करणाऱ्या द्रव्यांमधील द्रव्य. गुण–कडु, उष्ण, दीपक, सारक, हृदयाला हितकर, तिन्ही दोषनाशक. शूल, गुल्म, क्रिमि, कुष्ठ, कंडु, व्रण, विष, मेह, ज्वर, व रक्ताचे विकार नाशक.

**–पर्णी**–स्त्री., **वनस्पति० लज्जालुः** ( रा. ५.१६०; पृ. १५६ )

लाजाळू.

**–रात्र**–न., **सप्तानां रात्रीणां समुदायः** ( अहृसू. २.६ )

सात रात्री.

**–शिरा**–स्त्री., **वनस्पति० ताम्बूली** ( रा. ११.६; पृ. १३१ )

विड्याच्या पानांची वेल.

**–सप्त–संख्या–वि०**

सात ही संख्या. औषधातील द्रव्याच्या प्रत्येकी सात सात भावना असणे.

**सप्तर्षि**–पु., **वामदेवादयः सप्त ऋषयः, कश्यपात्रिभरद्वाजविश्वामित्रगौतमजमदग्निवसिष्ठा वा** ( चचि. ३.२२; असंशा. १०.६ )

सात ऋषि. कश्यप, अत्रि, भरद्वाज, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि व वसिष्ठ किंवा वामदेवादी सातऋषी.

**सप्तला**–स्त्री., **वनस्पति० सातला** ( चचि. १५.१७२; सुसू. ४४.८४; ध. १.२३८; अहृसू. ६.७५; पृ. ५६ )

शिकेकाई.

**सेहुण्डभेदः** ( ड. ) **श्रीफलिका च** ( सुसू. ३९.५ ) निवडुंगाचा प्रकार.

यवतिक्ताभेदः ( ड. ) शङ्खिनीभेदः ( सुक. ५.८४ ) द्र० ' शङ्खिनी '
सांखवेलीचा प्रकार. पहा ' शंखिनी '
बुध्ना ( ड. ) सुसू. ३९.४ ) एक वनस्पती.
वनमल्लिका ( रा. १०.२३६; पृ. १९९ )
रानमोगरा.

**-शङ्खिनीकल्प**-पु., अध्यायसंज्ञा० ( चक. १ )
सातवीण व सांखवेल यांचे कल्प दिलेला अध्याय.

**-स्नेह**-पु., सातलास्नेहः. तद्गुणाः-कटुस्तिक्तः कषायोऽधोभागदोषहरः कृमिकफकुष्ठानिलहरो दुष्टव्रणशोधनश्च ( सुसू. ४५.१२४ )
शिकेकाईचे तेल, तिखट, कडु, तुरट, खालच्या भागातील दोष काढणारे, कृमिकफकुष्ठवात नाशक व दुष्टव्रणशोधक.

**सप्तलिका**-स्त्री., वनस्पति० यवतिक्ता शङ्खिनी ( सुचि. १८.३४ )
मुंगुसवेलीचा प्रकार, सांखवेल.

**सप्तामृतवटी**-स्त्री., पारदयोग० पारदगन्धकपिप्पलीहरीतकीबिभीतकाटरुषभार्ङ्गीणामेकोत्तराधिकभागानां बब्बुलक्काथसंमर्दितानां बिभीतकप्रमाणा वटिकाः कार्याः, इयं श्वासकासादिनाशिनी ( र. १३.५९ )
पारा इत्यादींची वटी. पारा, गंधक, पिंपळी, हिरडा, बेहडा, अडूळसा, भारंगमूळ ही एक एक वाढत्या प्रमाणात घेऊन बाभळाच्या काढ्यात खल करावा. श्वास व खोकला यावर उपयुक्त. वटी बेहड्या एवढी करावी.

**सप्ताह**-पु., सप्तानां दिनानां समाहारः, दिनसप्तकम् ( अहसू. २०.१६ )
सात दिवस, सप्ताह, सतत सात दिवस सेवन ( नस्य ), आठवडा.

**सप्ताह्व**-पु., वनस्पति० सप्तपर्णः ( सुचि. ९.५०; असंसू. ४.५० )
सातवीण.

**सप्रजा**-स्त्री., अवन्ध्या ( चशा. २.५ )
मुले असलेली, वांझ नसलेली.

**सप्रसादक**-पु., वनस्पति० शालिः ( ध. ६.७१; पृ. २१९ )
साळ, भात.

**सप्राक्पेष्य**-पु., बस्तिप्रकारः, बस्तिसूत्रीयोक्तबलादिबस्त्युक्तकल्कयुतो बस्तिः ( चक्र. चसि. ७.११ )
बस्तीचा प्रकार. चिकणा इत्यादी औषधांची चटणी घातलेला बस्ति.

**सबल**-न., शालिपर्णीभेदः ( ध. १.८८; पृ. २३ ) द्र० ' शालिपर्णी ' सालवण प्रकार.

**सबीजबन्ध**-पु., पारदबन्ध० पिष्टीकृतैरभ्रकसत्त्वसुवर्णरूप्यताम्रकान्तैः परिजारितस्ततः षड्गुणगन्धकेन मारितः पारदः महाप्रभावोऽसौ ( र. ११.७९ )
पाऱ्याचा एक बंध ( गोळी ). अभ्रकसत्व, सोने, रुपे ताम्र, कांतभस्म ही पाऱ्यात जारण करून नंतर षड्‌गुण गंधक जीर्ण केलेला पारा. हा महाप्रभावी आहे.

**सभक्त**-न., भैषज्यकाल० सह भक्तेन-अन्नेन यदुपयुज्यते, तत्, तद्गुणाः-इदं स्त्रीणां दुर्बलानां शिशूनां तथा वृद्धानां च हितम्, औषधद्वेषिणां क्षतक्षीणानां पथ्यं बलाग्निरक्षकं च ( सुउ. ६४.७४; काखिल. ३.४९ )
अन्नासह. औषध घेण्याचा काळ अन्नाबरोबर जे औषध घेतले जाते ते. **गुण**—स्त्रिया, दुर्बल, वृद्ध, बाल यांना हितकर—तसेच औषधाचा द्वेष करणारे, उरःक्षताने क्षीण झालेल्यांना हितकर, शक्ति व अग्निरक्षक.

**सभा**-स्त्री., जनमेलकस्थानम् ( चक्र. १.९ )
जेथे लोक एकत्र जमतात ते स्थान.

**सभूतिक**-पु., वनस्पति० बिल्वः ( रा. ११.१३५; पृ.२७ )
बेल.

**सम**-वि., त्वक्समं त्वक्समतलं अविषमपरिघवत् ( सुनि. १३.४१ )
सारखे, त्वचेसमान. त्वचेपेक्षा उंच नसलेले. परिघ सारखा असलेले.
ऋजुः ( ड. सुचि.३७.११० ) सरळ.
समदृष्टिः ( असंसू. ५.४६ ) समदृष्टी.
सम दृष्टीचा. सर्वांना समान लेखणारा- समजणारा मानणारा.

**-क्रिय**-वि., समा क्रिया यस्य सः ( चशा. ६.२८ )
राग द्वेष विरहित सम- सारखी- सर्वांना एकच क्रिया ज्याची तो. ( काल )

**-क्रियत्व**-न., समा क्रिया नाम चिकित्सा यस्य, स समक्रियः, तद्भावः ( सुनि. ६.८ )

दोष आणि दूष्य यांची सारखीच चिकित्सा असणे. समान— सारखी क्रिया— चिकित्सा.

**–गन्धिक**–न., **वनस्पति० उशीरम्** ( ध. ३.१४; पृ. ९६ )
काळा वाळा.

**–घृतसक्तुप्राशाभ्यास**–पु., **उपक्रम० सहसमघृतसक्तुप्राशस्य सततं सेवनम्। स वृष्योदावर्तहराणां श्रेष्ठः** ( चसू. २५.४० )
सातूच्या पिठात समप्रमाणात तूप घालून सतत दररोज सेवन करणे. हे शुक्रवर्धक व वाताचे अनुलोमन करणाऱ्या द्रव्यात श्रेष्ठ आहे.

**–ज्वर**–पु., **ज्वरभेदः, अल्पहेतुर्बहिर्मार्गो वैकृतो निरुपद्रव एकाश्रयः सुखोपायः लघुपाकश्च ज्वरः समज्वर इत्युच्यते** ( काखिल. १.८ ) **द्र० ' ज्वर '**
ज्वराचा प्रकार. थोड्या कारणाने बाह्यमार्गात असलेला दोषांशी विषम ऋतु नसलेला उपद्रवरहित एक दोषाने झालेला, लवकर पक्व होणारा व सहज सुखाने बरा होणारा ज्वर समज्वर होय.

**–तल**–न., **करतलेन सदृशम्, करतलसादृश्ययुक्तम्, जिह्वातलेन वा** ( सुसू. २३.२० )
हाताच्या किंवा जिभेच्या तळव्यासारखे. भोवतालच्या त्वचेच्या पातळी इतके सारखे.

**–त्वागतवीर्य**–वि., **समत्वं परिपूर्णत्वम् आगतं वीर्यं यस्य सः, परिपूर्णसर्वधातुकः** ( सुसू. ३५.१३ )
आरोग्ययुक्त मानवी शरिरात जितकी रसादी धातूंची परिपूर्ति– उपचय आवश्यक असते तितकी होणे. पूरेपूर वीर्य येणे. स्त्रीपुरुष एकमेकाशी सम–अनुरूप–तुल्य वीर्याचे होणे.

**–देह**–वि., **ऋजु उपविष्टः** ( सुसू. ४६.४६४-६५ )
सरळ शरीर असलेला. वेडा वाकडा नसलेला.

**–देहाग्नि**–वि., **समकायाग्निः** ( सुसू. ३५.४६-४७ )
जठराग्नि. सम असलेला. योग्य मात्रा, योग्य काळी, योग्य विधियुक्त खाल्लेले अन्न चांगले पचविणारा अग्नि–समाग्नि; त्याने युक्त.

**–दोष**–वि., **समप्रमाणावस्थिता वातपित्तकफसंज्ञकदोषाःयस्य यस्मिन्वा सः** ( सुसू. १५.१४ )
शरीर संचलनार्थ आवश्यक प्रमाणाइतके वात, पित्त, कफ हे दोष ( धातु ) ज्याच्या शरिरात आहेत तो.

**–धातु**–वि., **प्रकृति० वातपित्तश्लेष्माणो गर्भात्प्रभृति समाः यस्य सः। अत्र धातुशब्दो दोषपर्यायपरः** ( चवि. ८.९५; अरु. अहृसू. १०.१)
**द्र० ' प्रकृति ' समप्रमाणावस्थिता रसादि धातवः** ( सुसू. १६.४० )
जन्मापासून वातपित्तकफ सम असलेला. येथे धातु शब्दाचा अर्थ दोष आहे. ज्याचे रसादी धातु समप्रमाण आहेत असा.

**–धृत**–वि., **समप्रमाणगृहीतम्, समप्रमाणम्** ( असंसू. १९'४ )
समप्रमाणाचे, सारख्या वजना मापाचे.

**–भक्त**–वि., **सभक्तम्, अत्र समशब्दः सहार्थे द्रष्टव्यः, तेन समभक्तं सभक्तम् इति** ( असंसू. २३.१७ )
जेवणावरोबर, अन्नासह. येथे समशब्दाचा सह असा अर्थ आहे.

**–योग**–पु., **सम्यग्योगः** ( चशा. १.१२९ )
काल, अर्थ, कर्म यांचा योग्य योग. शरिराच्या आरोग्याकरिता ज्या प्रमाणात जरुरी तितक्याच प्रमाणात त्यांचा शरिराशी संपर्क.

**–योगवाहिन्**–वि., **समानां तुल्यानां वातादीनां योगो मेलकः, तं समयोगं वोढुं शीलमस्येति समयोगवाहि ( शरीरम् )** ( चशा. ६.४ )
समान असलेल्या वातपित्तकफांच्या समुदायाचा योग–संपर्क धारण करण्याचा स्वभाव ज्याचा ते. ( शरीर ).

**–वर्ज**–( अ; ) **समो नाम समाग्निः, तं वर्जयित्वा** ( चचि. १५.७१ )
सम म्हणजे समाग्नि. समाग्नि सोडून. ( बाकीचे )

**–वर्णजा**–स्त्री., **वनस्पति० व्रीहिः** ( रा. १६.१०७;पृ. २९२ )
तांदुळापैकी एका जातीचे तांदूळ.

**–वर्तिन्**–पु., **निष्पक्षं सर्वप्राणिद्दरत्वत् यमः, कालमृत्युः** ( चइ. ११.२५ )
सारखे वागणारा, भेदभाव न ठेवता वागणारा यम. कालमृत्यु.

**–सर्वधातु**–वि., **समधातुप्रकृतिः ( पुरुषः )** ( चवि. ६.१४ )
सर्व वातपित्त कफ धातु सम. शरिराच्या आरोग्यास योग्य प्रमाणाइतके असलेला ( पुरुष ) सम प्रकृतीचा.

**समङ्गा**–स्त्री., वनस्पति० लज्जालुः
( चचि. ४.७६; अहसू. १५.३७; ध. ४.१०९, पृ. १५५ )
लाजाळू.
**मञ्जिष्ठा**
( चचि. ४.८९; सुचि. २.७३; ध. १.१७; पृ. १० )
मंजिष्ठ.
**वराहक्रान्ता** ( चसू. ४.९ )
एक संधान करणारी वनस्पति. ( लाजाळू )
**अञ्जलिकारिका** ( सुसू. ३७.२४ ) लाजाळू.
**बला** ( ध. १.२८०; पृ. ६४ ) चिकणा.

**समनस्क**–वि., **मनसा सहितम्** ( चसू. ८.१५ )
मनासह.

**समन्तदुग्ध**–पु., वनस्पति० **स्नुही**
( ध. १.२३५. पृ. ५५ )
त्रिधारी निवडुंग.

**( समन्तदुग्धा )**–स्त्री., वनस्पति० **स्नुही**
( ध. १.२३५. पृ. ५५ )
त्रिधारी निवडुंग.

**समम्**–अव्य., **एककालम्** ( सुउ. १३.१५ ) एका वेळी.

**समय**–पु., **अस्य शब्दस्येदमर्थजातमभिधेयमिति अभिधानाभिधेयनियमनियोगः । समयः सिद्धान्तः 'समयः शपथाचारकालसिद्धान्तसंविदः' इत्यमरः । समयस्त्रिधा भवति -आयुर्वैदिकसमयो याज्ञिकसमयो मोक्षशास्त्रिक समय इति** ( चवि. ८.५४ )
या शब्दाचा हा अर्थ असतो; असा जो शब्द (अभिधान) व अर्थ (अभिधेय) यांचा निश्चित संबध आहे असा जो संकेत तो–समय म्हणजे सिद्धांत; त्याचे प्रकार तीन–आयुर्वेदातील संकेत, यज्ञातील संकेत व मोक्षशास्त्रातील संकेत.
**कालः, नियतायुर्मर्यादा** ( असंसू. ८ )
आयुष्याची ठरलेली मर्यादा.

**समवाय**–पु., **वैशेषिकसंमतषट्पदार्थेष्वेकः, सोऽयम् अयुतसिद्धवृत्तिर्नित्यसंबन्धः** ( चवि. ८.२९ )
वैशेषिक शास्त्राला संमत अशा सहा पदार्थांतील एक पदार्थ. वेगळे न राहणाऱ्या आधाराधेयभूत असणाऱ्यांचा जो संबंध तो समवाय. उदा० गुण–गुणवान, कर्म–कर्मवान यांचा जो नित्यसंबंध तो.
**संयोगः, समूहः** ( सुशा. १.१६ ) संयोग, समुदाय.
आ. को. म. १९६

**समवायिन्**–वि., **समवायाधेयः** ( चसू. १.५१ )
समवायाचा आधार असलेला.
**संसर्गी** ( सुउ. ३९.२९४ )
दोन दोषांचा संसर्ग असलेला ( ज्वर ) द्विदोषज ज्वर.
–**(समवायि कारण)**–न., **यत्समवेतं कार्यमुत्पद्यते तत् कारणम्– यथा तन्तवः पटस्य**
( चसू. १.५१; सुसू. ४०.३ )
जे कारण आपल्याठायी समवायसंबंधाने कार्य उत्पन्न करते ते. जसे तंतु कापडाचे कारण.

**समशन**–न., **भोजनप्रकारः पथ्यापथ्यान्नस्य एकत्र सेवनम्, पथ्यापथ्यं किञ्चिदेकत्र मिलितं, यथा रक्तशाल्यन्नं यवकान्नं च मिलितम्** ( चक. चचि. १५.२३६; सुउ. ५०.५; अहसू. ८.३३ )
जेवणाचा प्रकार. पथ्यकर व अपथ्यकर अन्नांचे एकत्र सेवन. पथ्यकर तांबसाळ व अपथ्यकर लहान जव हे एकत्र मिसळून खाणे.

**समष्ठिल**–पु., वनस्पति० **आम्रभेदः, कटुरुष्णः रुच्यो मुखविशोधनो दीपनो दाहकृत् कफवातप्रशमनकरः**
( रापरि. ४.१; पृ. ३३४ )
आंब्याचा प्रकार–तिखट, उष्ण, रुचकर, दीपक, तोंड स्वच्छ करणारा, दाह करणारा, कफवातशामक.

**समस्तगात्र**–वि., **सकलप्रशस्तगात्रयुक्तः** (सुशा. ५.४९)
सर्व अंगोपांगे प्रशस्त ( योग्य ) असलेला.

**समस्तज**–वि., **सन्निपातजः, दोषत्रयसमवायदुष्ट्या सम्भवन्** ( **ज्वरादिरोगः** ) ( र. ३०.२३ )
सर्वदोषज, त्रिदोषज ( ज्वर, इत्यादी रोग ).

**समांश**–वि., **तुल्यप्रमाणम्** ( अरु. अहसू. ७.३९ )
सारख्या प्रमाणाचा.

**समाग्नि**–पु., **वह्निर्यथाविधि भुक्तं सम्यगेव पचेत् सः**
( असंशा. ६ )
जो योग्य प्रमाणात व योग्य विधीने खाल्लेले अन्न चांगले पचवितो तो अग्नि समाग्नि होय.
वि., **समा अग्नयो यस्य सः** ( सुसू. १५.४१ )
ज्याचा अग्नि सम आहे तो.

**समातृगण**–पु., **मातृसमूहयुक्तः** ( **ईश्वरः** )
( चचि. ३,३१० )
मातृगणांसह ( ईश्वर )

**समाधान**–न., **समाधिः समाधीयतेऽस्मिन् चित्तमिति समाधानं समाधिः** ( चशा. १.८० )

समाधि. आत्म्याच्या ठिकाणी मनाचे सम्यक आधान म्हणजे समाधि.

**समाधि**–पु., **विषयेभ्यो निवर्त्यात्मनि मनसो नियमनम्** ( चसू. १.५८ )

मन विषयांपासून निवृत्त होऊन आत्म्याच्या ठिकाणी रत होणे.

**समान**–पु., वातभेदः ( चसू. १२.८ ) **स्थानानि आमपक्वाशयमध्यः** ( सुनि. १.१६ ) **अग्निसमीपस्थानं, सर्वं च कोष्ठम्** ( अहृसू. १२.८ ) **स्वेददोषाम्बुवाहीनि स्रोतांसि, अन्तरग्नेः पार्श्वभागः** ( चचि. २८.८ ) **समानो वायुः सर्वं कोष्ठं चरत्यन्नं गृह्णाति पचति विवेचयति मुञ्चति च** ( अहृसू. १२.८ ) **अग्निसंधुक्षणं करोति** ( असंसू. २०.४ ) **प्रकुपितः समानः गुल्माग्निसादातिसारप्रभृतीन् गदान् कुरुते** ( सुनि. १.१७ ) **द्र० 'दोष' वात'**

समान वायु. वाताचा प्रकार. अग्नीच्या जवळ आमाशय व पक्वाशय यांमध्ये सर्व अंतःकोष्ठात, अग्निदोष व जलवह स्रोतसे यात संचार करितो, अन्न घेतो, पचवतो, त्याचे सारकिट्ट विभजन करतो व ते ते योग्य ठिकाणी सोडतो. अग्नि वाढवितो. तो दुष्ट झाला तर गुल्म, अग्निमांद्य, अतिसार इत्यादी विकार करतो.

वि., **तुल्यधर्मकम्** ( हे. अहृसू. १.१४ )

समान धर्माचे, समधर्मी.

**–गुण**–वि., **समानो गुणो येषां ते ( आहारविकाराः )** ( चशा. ६.९ )

ज्यांचे गुण सारखे आहेत ते आहाराचे पदार्थ.

**–गुणभूयिष्ठ**–वि., **समानो गुणो भूयिष्ठोऽधिकतमो यस्मिन्, सः** ( चशा. ६.९ )

समान गुण आधिक्याने ज्याच्यात आहेत तो.

**–प्रकोप**–पु., **विषमाजीर्णशीतसंकीर्णभोजनाकालशयनजागराद्यैः प्रकुपितः समानः शूलगुल्मग्रहण्यादीन् पक्वामाशयजान् गदान् करोति** ( असंनि. १६.२७-२८ )

अकाली, पुष्कळ किंवा थोडे जेवणे, अजीर्ण झाले असता जेवणे, थंड पदार्थांचे भोजन, विरुद्ध गुणाचे पदार्थ एकत्र करून खाणे, अवेळी झोप, रात्री जागरण इ० मुळे समान वायु कुपित होतो. तो शूल, गुल्म, ग्रहणी इत्यादी पक्वाशय आणि आमाशय संबंधी रोग उत्पन्न करतो.

**–वायु**–पु., वातभेदः, समानः ( चचि. १५.२०३ )

समान वायु. वाताचा एक प्रकार.

**समानाभिहार**–पु., **समानेन द्रव्यादिना सह मिश्रणम्** ( चसू. ११.८ )

समानधर्म द्रव्यांमध्ये असणे, मिसळणे, एकत्र होणे.

**समावर्तन**–न., **पारदसंस्कार० द्रावणम्** ( र. २१.१०४-१०६ )

पाऱ्याचा एक संस्कार. पाऱ्यात वीज घालणे.

**समाश्वासन**–न., **विश्रमणम्** ( चचि. २८.७६ )

धीर देणे, विसावा देणे.

( अव्य० ) **समान्तरम्, समामध्ये, संवत्सरमध्ये, समा नाम वर्षमन्तरवधिर्यस्मिन्कर्मणि यथा स्यात्तथा** ( चइ. ११.३ )

एका वर्षाच्या आत. ( मृत्यूचे सूचक )

**समास**–पु., **संक्षेपः** ( चसू. ३०.१८; सुशा. ५.६ )

संक्षेप, थोडक्यात.

**संग्रहः, अन्योन्यमेलकः** ( चक्र. चसू. १३.२७ )

एकमेकात मिसळविणारा.

**समासन्नवर्तिन्**–वि., **समीपस्थितः ( परिचारकः )** ( असंसू. ८.३ )

नेहमी जवळ असणारा. ( परिचारक. )

**समासीन**–वि., **सम्यगासीनः, उपविष्टः** ( सुसू, ४६.४६५-४६६ )

व्यवस्थित बसलेला, बसलेला.

**समाहित**–वि., **न्यूनातिरिक्तमानवर्जितम् ( यन्त्रादि )** ( सुसू. ७.९ )

प्रमाणापेक्षा कमीजास्त नसलेले. ( यंत्र इ० )

**समाह्वान**–न., **निष्कारणमाहूय स्वेच्छालापकथनम्** ( सुचि. २४.१०१ )

दुसऱ्याला कारण नसताना बोलावून मनाला वाटेल ते सांगणे.

**समिति**–स्त्री., **संग्रामः** ( सुशा. ४. ६८-७० )

संग्राम, युद्ध.

**समिध्**–स्त्री., **खदिराणां क्षीरवृक्षाणां वा होमार्थं वितस्तिमात्रं काष्ठम्** ( सुसू. २.४ )

समिधा. समिध्यते होमाकरिता पेटवली जाते ती समिध. खैर, वड, पिंपळ, इत्यादी झाडांच्या वीतभर लांबीच्या काड्या.

**( समिद् )–वर**–पु., **वनस्पति० पलाशः** ( ध. ५.१६२; पृ. २०३ ) पळस

**समीक्ष्यकारिन्**–वि., **विमृश्यविधायी, विमृश्य विचार्य कार्यसम्पादकः** ( अहृसू. ४.३६ )
विचार करून कार्य करणारा. विचाराने वागणारा.

**समीरण**–पु., **दोष॰ वायुः** ( सुनि. १.१९ ) वात दोष.
**वनस्पति॰ जम्बीरः** ( रा. १०.८०; पृ. १४४ )
ईडलिंबू.

**समीरसार**–पु.,**वनस्पति॰ बिल्वः** ( रा. ११.१३५; पृ. ९७ )
बेल.

**समुच्चय**–पु., **तन्त्रयुक्ति॰ यदिदं चेदं चेति कृत्वा विधीयते । यथा 'वर्णश्च स्वरश्च' इत्यादि** ( चसि. १२.४४; सुउ. ६५.३८ )
तंत्रयुक्ति. जे, हे आणि हे असे करून सांगितले जाते ते. जसे हा वर्ण आणि हा स्वर असे स्पष्ट सांगणे.

**समुच्छ्राय**–पु., **उद्गतिः** ( ड. सुसू. १०.५ )
वाढ, तीव्रता.

**समुत्क्षिप्ता**–वि., **अतित्वरिता** ( चक. चचि. २८.४१ )
अति त्वरेने बोलणारी वाणी, लवकर, घाईने बोलणारी वाचा (जीभ).

**समुत्था**–स्त्री., **उत्पत्तिः** ( सुनि. ६.७ ) उत्पत्ती.

**समुत्थान**–न., **कारणम्** ( चशा. ६.२७ ) **निदानम्** ( चनि. १.३ )
कारण. ज्याच्या पासून कार्य निर्माण होते ते ( कारण ). रोगाचे कारण ( निदान ).
**संप्राप्तिः** ( सुनि. १३.४५ ) रोगाची संप्राप्ति. रोग होण्याची रीति कारणे व रोग यामधील स्थित्यंतरे.
( **परिव॰** ) **मृतस्य लोहस्य पुनः स्वभावगमनम्** ( र. ८.१८ )
मारलेला धातु पुन्हा जिवंत होणे.

**समुत्सन्न**–वि., **विवृद्धमांसः ( व्रणः )** ( अहृसू. २९.६९ )
वाढलेल्या मांसाचा, वर उचलून आलेल्या मांसाचा ( व्रण ).

**समुदय**–पु., **समुदायः** ( चवि.१.११ ) समुदाय. समूह.

**समुदाय**–पु., **समवायः, समूहः** ( सुसू. ४१.३ )
एकत्रित, समूह, मेळावा.

**–प्रभावतत्त्व**–न., **मेलकप्रभावनिर्णयः** (चवि. १.१०)
एकत्र आलेल्यांच्या प्रभावाचा निर्णय.

**समुदीरण**–न., **उत्पत्तिकरणम्** ( सुउ. ५७.५ )
उत्पन्न करणे.

**समुदीर्ण**–वि., **प्रकुपितः** ( सुचि. ३४.७ )
प्रकुपित. वाढलेला.

**समुद्ग**–न., **संपुटम्** ( सुउ. ४४.२९ ) संपुट, पुड, पूड.

**समुद्गीर्ण**–वि., **पारदेन समुद्गीर्णः गंधकादि धातुः, ग्रस्त-धातुः** ( र. १५.४४-४६ )
पाऱ्यामध्ये जिरविलेला व पुन्हा पृथक केलेला पदार्थ ( गंधक ).

**समुद्भ्रम**–पु., **विभ्रमः** ( चवि. ९.८ )
विभ्रम, भ्रम ( मन, बुद्धि, स्मृति ) नसत्या गोष्टींचा विचार; नाही त्या गोष्टींचे स्मरण इत्यादी.

**समुद्भ्रान्त**–वि., **विक्षिप्तः** ( डल्हणः सुउ. ३९.२३ )
इतस्ततः विक्षिप्त. इकडे तिकडे फेकलेले, विखुरलेले

**समुद्र**–पु., **सागरः, रत्नाकरः** ( सुसू. ५.२६-२७ )
सागर, समुद्र.

**–कफ**–पु.,**भैषज्य॰ समुद्रफेनः** ( असंउ. १४ )
समुद्रफेन, समुद्रफेस.

**–कान्ता**–स्त्री., **वनस्पति॰ स्पृक्का** ( रा. १२.११३; पृ. १०८ ) पिंडिका.

**–ज**–न., **लवण॰ सामुद्रम्** ( ध. २.३४; पृ. ७५; र. १८.१३१ )
मीठ. समुद्राच्या पाण्यापासून केलेले.

**–जल**–न., **सागरोदकम्, तद्गुणाः–लवणं विस्रमुष्णं रक्तविकारकरं पित्तकरं वैवर्ण्यदाहकरं च** ( रा. १४.३२३; पृ. २५८ )
समुद्राचे पाणी. गुण– खारट, दुर्गंधी, ( मांसाचा वास असलेले ) उष्ण, रक्ताचे रोग करणारे, वर्णनाश पित्त व दाह करणारे.

**–फल**–न., **वनस्पति॰ तद्गुणाः–कटूष्णं त्रिदोषघ्नं विशेषतो वातघ्नं भूत–कफामय–भ्रान्तिनाशकं त्रिदोषव्याधिहरं च** ( रापरि. ६.१४; र. २०.१३०-१३६; पृ. ३४६ )
समुद्रफळ. गुण— तिखट, उष्ण, त्रिदोष विशेषतः वातघ्न, त्रिदोषज रोग नाशक, कफविकार, भूतबाधा व भ्रांतिनाशक.

**–फेन**–न., पु., **भैषज्य॰ जाङ्गमविशेषः, शुक्रशोधन-गणोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१२ ) **अयं कुष्ठेषु लेखनोपयोगी** ( चचि. ७.५७; सुचि. ९.१० ) **अनुशस्त्रं च** ( असंसू. ३४.३२ ) **तद्गुणाः–कषायः शीतो लेखनो रुच्यः कफघ्नो गुल्मप्लीहहरः कर्णपाक-नेत्रकण्ठरोगविषहरश्च** ( ध. ३.१५४; पृ. १२६ )

समुद्रफेन, समुद्रफेस. प्राणिज औषधिद्रव्य. एक उपशस्त्र. शुक्रशोधक गणातील एक. कुष्ठात घासण्या करिता उपयोगी. गुण— तुरट, थंड, दोष घासून काढणारा, रुचि निर्माण करणारा, कफनाशक, गुल्म प्लीहा, कान पिकणे, डोळ्याचे व घशाचे रोगनाशक आणि विषनाशक.

**–मण्डूकी**–स्त्री., **जलशुक्तिः (ड.) मुक्ताशुक्तिः** ( सुचि. १.१०० )
समुद्रातील शिंप, मोत्याचा शिंपला. पाण्यातली शिंप.

**–लवण**–न., **लवण० सामुद्रलवणम्** ( रा. ६.४२; पृ. ७५ )
समुद्राच्या पाण्यातले मीठ.

**–वृश्चिक**–पु., **कीट० आलविषः. सामुद्रो वृश्चिकः द्र० 'वृश्चिक'** ( सुक. ३.५ )
समुद्रातला विंचू. पहा 'वृश्चिक'

**समुद्रान्ता**–स्त्री., **वनस्पति० कार्पासी** ( रापरि. ४.४६; पृ. ३३८ )
कपाशी. कापसाचे झाड.

**समुन्नद्ध**–वि., **समन्तादुन्नतम्** ( सुनि. ९.१७ )
भोवताली उंचावलेला. भोवताली सुजलेला. ( वारुळा सारखा उंच झालेला. )

**समुन्नद्धोदरता**–स्त्री., **लक्षण० समन्तादुदरस्योन्नतत्वम्, उदराध्मातत्वम्** ( सुचि. ३४.१५ )
पोट सर्व बाजूने उचलून वर येणे. पोटफुगी.

**समूहक्षारक**–पु., **लवणभेदः, सर्वक्षारः** ( रा. ६.५७, पृ. ७६ )
मिठाचा प्रकार, सर्वक्षार, खार.

**समूहगन्ध**–न., **गंधद्रव्य० जवादि** ( रापरि. १२.६; पृ. ३७५ )
एक कृत्रिम सुगंधिद्रव्य.

**समृद्ध**–वि., **उपचितः** ( चइ. ९.४ )
समृद्धि असलेला. समृद्ध. पुष्कळ प्रमाणांत किंवा पुष्कळ संख्येने असलेला.

**संपत्ति**–स्त्री., **समृद्धिः** ( सुचि. ३१.१२ )
समृद्धि, संपूर्णतः प्राप्ति.

**संपद्**–स्त्री., **प्रशस्तगुणता** ( चक्र. चसू. ९.७ ) **उत्कृष्ट-गुणः** ( चचि. ३०.२२९ )
प्रशस्त गुण असणे. उत्कृष्ट गुण.

**संपदा**–स्त्री., **वनस्पति० ऋद्धिः** ( रा. ४.१८८; पृ. ३४ )
ऋद्धि. अष्टवर्गापैकी एक. जीवनास उपकारक गणातील एक वनस्पती.

**संपन्न**–वि., **रसादिसंपत्त्या यद्युक्तंतत्संपन्नम्** ( अहसू. १.२८ )
समृद्धि. परिपूर्णत्व. रस इत्यादी ज्यात उत्कृष्ट आहेत ते. रसादि संपत्तीने युक्त.
**पाकसंस्कारादिना युक्तम्** ( असंसू. २.२३ )
पचन संस्कार इत्यादींनी गुणयुक्त होणे.

**संपर्क**–पु., **संबन्धः** ( असंसू. ८.८४ ) संबंध. स्पर्श.

**संपाक**–पु., **क्वाथः** ( चशा. ८.४१; असंशा. ३(४).३४ )
काढा. व्यवस्थित पचलेला.

**संपाचन**–न., **उपक्रम० पाचनम्** ( सुउ. ५६.१२ )
उपचार. पचवणे, पाचन करणे.

**संपूरक**–वि., **अतिमात्राशनशीलः** ( चचि. १९.७ )
प्रमाणापेक्षा फार अधिक खाण्याची खोड असलेला. खादाड. खाबू.

**संपूरण**–न., **अत्यशनम्** ( चचि. ५.१४ )
अति खाणे; अत्याहार.

**संपूर्णता**–स्त्री., ( **धात्वादिविषयकः** ) **पूर्णत्वम्** ( सुसू. ३५.३९ )
पूर्णत्व, संपूर्णता.

**संपृक्त**–वि., **संयुक्तः** ( अहसू. १३.२७ ) संयुक्त.

**संपोथन**– ( परिव० )–न., **कुट्टनम्** ( असंक. १ )
कुटणे, प्रहार करणे.

**संप्रच्छन**–( परिव० )–न., **उपक्रम० लेपनम्** ( सुचि, ९.२४ ) उपचार, लेप लावणे.

**संप्रच्छित**–वि., **लेपितम्** । फासण्या घातलेले.

**संप्रतिपत्ति**–स्त्री., **सम्यग् ज्ञानम्** ( चवि. ७.८ )
व्यवस्थित ज्ञान, चांगले ज्ञान.
**यथाकर्तव्यतानुष्ठानम्, इयं कालज्ञानप्रयोजनानां श्रेष्ठा** ( चसू. २५.४० )
काळाच्या ज्ञानाच्या कारणामध्ये जसे करणे योग्य आहे तसे करणे श्रेष्ठ आहे.

**संप्रबोधन**–न., **उपक्रम० संज्ञाजननम्** ( चवि. १०.१४ )
एक उपचार. शुद्धीवर आणणारा उपचार.

**संप्रयोग**–पु., **संयोगः, संबन्धः** ( चशा. ३.१३ )
संयोग, संबंध.
**प्रयोगः** ( चनि. ७.७(१) ) करणे, वापरणे.
**सङ्गः, विषयसेवा, व्यवायः** ( सुचि. २६.१० )
संभोग.

**संप्रवर्तन**–( परिव० ) न., **प्रवर्तमानस्योपेक्षया प्रवर्तनम्** ( चक्र. चचि. १९.१४ )

दोषाची बाहेर जाण्याची प्रवृत्ती ( अतिसारासारख्या विकारात ) होत असेल ती न अडवता होऊ देणे; अपूर्ण होत असेल तर ती चांगली होण्यासाठी ( विरेचनादि देऊन ) साह्य करणे.

**संप्रसक्त**–वि., **निरन्तरम्** ( सुनि. ७.११-१३ )
निरंतर, सारखा, पुनःपुन्हा.

**संप्रसादन**–वि., **सवर्णत्वकरम्** ( चक्र. चचि. २१.९८ )
मूळच्या वर्णासारखा वर्ण करणारे, शामक.

**संप्रसाधन**–न., **मण्डनम्** ( चसू. ५.९९ )
व्यवस्थित रचना करणे-बांधणे.

**संप्रहार्य**–वि., **शक्यवारणम्, शक्यं निवारणं यस्य** ( **याम्यसत्त्वः** ) ( चशा. ४.३७(४)
ज्याचे निवारण करता येणे शक्य आहे ते. ( याम्यसत्त्व लक्षण )

**संप्राप्ति**–स्त्री., **व्याध्युपलब्धिकारणेष्वेकम्** ( चनि. १.६ ) **तत्स्वरूपम्–यथा दुष्टेन दोषेण यथा च संनिवेशविशेषेण देहमनुधावता सता प्रत्यामयं या निर्वृत्तिः, सा संप्राप्तिः** ( अहृनि. १.८ ) " **व्याधिजन्ममात्रमन्त्यकारण-व्यापारजन्यं संप्राप्तिमाहुः** " ( चक्र. चनि. १.११ ) **संख्याप्राधान्यविकल्पबलकालविशेषभेदात्सा बहुविधा संभिद्यते** ( चनि. १.१२(१) **तत्र संख्या-संप्राप्तिर्यथा–अष्टौ ज्वराः, पञ्च कासाः। प्राधान्य-संप्राप्तिर्यथा–स्वातन्त्र्यपारतन्त्र्याभ्यामनुबन्ध्यनु-बन्धभेदात्तरतमयोगाद्वा व्याधीनां प्राधान्या-प्राधान्ये, ताभ्यां भिद्यमाना तद्विशेषा वा संप्राप्तिः। विकल्पसंप्राप्तिर्यथा–विकल्पो नाम वातादि-दोषाणामेकस्मिन्व्याधौ समवेतानामंशांशकल्पना तद्विशिष्टा विकल्पसंप्राप्तिः। बलविशेषा संप्राप्तिर्यथा हेतुपूर्वरूपादीनां तुलनया व्याधेर्बलाबलत्वविनिश्चयो बलसंप्राप्तिः। कालविशेषा संप्राप्तिर्यथा–दोषाणा-मृत्वहोरात्राहारसमयनियतः प्रकोपः कालविशेषा संप्राप्तिः** ( चनि. १.१२; असंसू. १.१३-१४; अहृनि. १.८-११ )
संप्राप्ति. रोगोत्पत्ति क्रम. रोग जाणण्याच्या कारणांपैकी एक. रोग उत्पन्न होण्याच्या कारणांपैकी एक.
**संप्रातीचे स्वरूप**— दोष कसे दुष्ट झाले, ते शरिरांत कसे पसरले व ते ते दोष त्या त्या स्थानात जाऊन रोगाची उत्पत्ती कशी झाली ती रीती म्हणजे संप्राती. कारणांपैकी शेवटच्या कारणाच्या व्यापारापासून केवळ रोगाची उत्पत्ती होणे संप्राती होय. प्रकार— १ संख्या २ प्रधानत्व ३ अंशांशकल्पना ४ बल ५ काल यांच्या अनेक वैशिष्ट्याने पुष्कळ प्रकार होतात. जसे— १ **संख्यासंप्राप्ति**— आठ ज्वर, पाच खोकले यात त्या त्या संख्येइतक्या प्रकारांनी तो रोग संभवनीय असतो हे दाखविले जाते. म्हणून तिला संख्यासंप्राप्ति म्हणतात. २ **प्रधानसंप्राप्ति**—स्वतंत्र दोष कोणता, परतंत्र कोणता, कमी कोणता, अधिक व सर्वात अधिक दोष कोणता, अनुबंधी दोष कोणता, अनुबंध्य कोणता या दृष्टीने संप्रातीचा विशेष पाहणे प्राधान्य संप्राप्ति होय. ३ **विकल्पसंप्राप्ति**—एकत्रित दोषांची अंशांश कल्पनेने संप्राप्ति ठरवणे ४ **बल-संप्राप्ति**—कारण, पूर्वरूप, रूप इत्यादींवरून तुलनेने रोगाचे बलाबल पाहण्याच्या दृष्टीने संप्राप्ति पाहणे. ५ **कालसंप्राप्ति**—दोषाचा ऋतु, अहोरात्र, आहार काल यांना अनुसरून होणाऱ्या दोषांच्या प्रकोप दृष्टीने संप्राप्ति ठरविणे.
**योगः प्राप्तिः** ( चशा. १.९८ )
योग, प्राप्ति, प्राप्त होणे, मिळणे.
**उपलब्धिः** ( सुनि. १.१० ) **ग्रहणम्** ( सुशा. ६.३६ ) सापडणे, व्यक्त होणे, घेणे.

**संप्रीणन**–वि., **बृंहणम्** ( चशा. ८.३१ )
पुष्टि करणारे ते पौष्टिक.

**संप्लव**–पु., **निमज्जनम्** ( चनि. ८.५ ) बुडणे.
**विभ्रमः, स्वरूपान्यथात्वम्** ( चक्र. चचि. १०.३ )
भ्रम. निराळे स्वरूप वाटणे.
वि., **संकीर्णम्** ( सुसू. ११.१८; सुसू. १९.५ )
अडचणीची, त्रासदायक, संकटाची. ( जागा, देश. )
**संबद्धम्, संधियुक्तं** (वङ्क्षणादि) (असंसू. ३८.४२)
संधियुक्त.

**संबाध**–पु., **मत्कुणादिभिः पीडा** ( सुशा. १०.३; असंशा. १२.१९ )
ढेकूण इत्यादींची पीडा.
**–निःसृति**–स्त्री., **संकटनिस्तरणम्** ( चइ. १२.८४ )
संकटाचे निवारण. आपत्ती निस्तरणे.

**संबाधाञ्जन**–न., **अञ्जनप्रकार० संधावः** ( असंउ. १४ )
अंजनाचा प्रकार.

**संभरण**–न., **संचयः, प्राप्तिः** (चसू. १५.३) संचय. प्राप्ति.

**संभव**–पु., **तन्त्रयुक्ति० संभवो नाम यद्यस्मिन्नुपपद्यते, स तस्य संभवः, यथा मुखे पिडुव्यङ्गनीलिकादयः संभवन्तीत्यादि** ( चसि. १२.४५ )

संभव म्हणजे जे ज्याच्यांत उत्पन्न होते तो त्याचा संभव ( उत्पत्तिस्थान ) जसे तोंडावर पिप्लु, वांग, निळसर चट्टे इत्यादी होतात. हा मुख संभव होय. **प्रमाण० सम्भवति अस्मात् इति सम्भवः कारणम् , संभवो नाम यो यतः संभवति, स तस्य संभवः। यथा षड्धातवो गर्भस्य संभवः** ( चवि. ८.४९ ) प्रमाण विशेष. कारण. संभव. म्हणजे जो ज्याच्यापासून संभवतो–उत्पन्न होतो तो त्याचा संभव. जसे सहा धातूंपासून ( सचेतन पाच महाभूते ) गर्भ होतो म्हणून षड्धातु गर्भाचा संभव.

**–हेतु**–पु., **संभव उत्पत्तिस्तत्र कारणम्, अभिव्यक्तिकारणम्** ( ड. ) **यथा–अव्यक्तं जगतः संभवहेतुः** ( सुशा. १.३ )
उत्पत्ति, कारण. अभिव्यक्तीचे कारण. जसे अव्यक्त हे सर्व जगाच्या अभिव्यक्तीचे कारण आहे.

**संभार**–पु., **उपकरणादिसामग्री** ( चसू. १५.३ ) **यन्त्रशस्त्रक्षाराग्निशलाकाप्रभृतिः** ( सुसू. ११.१८; अहसू. ५.६६ )
यंत्रे, शस्त्रे, क्षार, अग्नी, सळया इत्यादी उपकरणे ही सामुग्री.

**संभाषाविधि**–पु., **संभाषणकर्म, तद्विधिः–भिषग्भिषजा सह संभाषेत। तद्विद्यसंभाषा हि ज्ञानाभियोगसंहर्षकरी भवति। वैशारद्यमपि चाभिनिर्वर्तयति। वचनशक्तिमपि चाधत्ते। यशश्चाभिदीपयति। पूर्वश्रुते च संदेहवतः पुनः श्रवणाच्छ्रुतसंशयमपकर्षति। श्रुते चासंदेहवतो भूयोऽध्यवसायमभिनिर्वर्तयति। अश्रुतमपि च कंचिदर्थं श्रोत्रविषयमापादयति। यच्चाचार्यः शिष्याय शुश्रूषवे प्रसन्नः क्रमेणोपदिशति गुह्याभिमतमर्थजातं तत्परस्परेण सह जल्पन् पिण्डेन विजिगीषुराह संहर्षात्। तस्मात्तद्विद्यसंभाषामभिप्रशंसन्ति कुशलाः** ( चवि., ८.१५ )
संभाषणाचा विधि–पद्धत–रीति– संकेत. विधि–वैद्याने वैद्याशी चर्चा करावी. तद्विद्य संभाषा म्हणजे त्या त्या शास्त्रांतील ज्ञात्याशी केलेली चर्चा; ही ज्ञान वाढविणारी व तज्जन्य आनंदकारी असते. तिने नैपुण्य येते, बोलण्याची कला निर्माण होते, आपल्या यशाची चमक दिसू लागते, पूर्वी ऐकलेल्या बद्दल नीट कळले नसेल, समजले नसेल, संशय राहिला असेल तर पुन्हा तो विषय ऐकल्याने बोलण्याने तो नाहीसा होतो. पूर्वी केलेले असून व संशय नसतानाही तो विषय पुन्हा चर्चिला गेला तर त्याबद्दल निश्चित मत ( ज्ञान ) निर्माण होते. पूर्वी कधी न ऐकलेलेही ऐकावयाला मिळते, शिष्याच्या सेवेने संतुष्ट झालेले गुरु स्वतः विजय मिळवणारे असल्यामुळे शिष्यालाही गूढ ( मर्म ) असा अर्थ शिष्याबरोबर क्रमशः चर्चा करून आनंदाने सांगतात याच दृष्टीने तद्विद्यसंभाषा पद्धतीची सूज्ञ प्रशंसा करतात.

**संभिन्न**–वि., **मर्दितम्, एकीकृतम्** ( र. २.१२६-१२७ )
एक केलेले, एकत्र खल केलेले.
**असंबद्धम्** ( अहसू. २.२२ )
असंबद्ध. संबंधरहित; विसंगत.

**संभिन्नालाप**–पु., **असंबद्धप्रलपनमसत्प्रलापः** ( अहसू. २.२२ )
संबंध नसलेले–काही तरी बडबडणे, अवास्तव वडबडणे. विसंगत बडबड.

**संभुक्त**–न., **भैषज्यकाल० चित्रभोज्यैः सह भैषज्यप्रदानम्, अरुचौ कालोऽयमुक्तः** (चक्र. चचि. ३०.३०१)
औषधाची वेळ. निरनिराळ्या रुचकर पदार्थाबरोबर औषध देणे. अरुची या विकारावर हाच काल आषधाकरिता योग्य आहे.

**संभृत**–वि., **सम्यक्कृतः** ( सुचि. ४०.६४ )
चांगले. योग्य ते केलेला.

**–त्व**–न., **पुष्टत्वम्** ( अहसू. १४.३५ )
पुष्टि. पौष्टिकपणा. पुष्ट होणे.

**संभृष्टपरुषच्छवि**–वि., **लक्षण० संभृष्टस्य दग्धस्येव परुषा छविर्यस्य सः** ( अध्वप्रशोषी ) ( सुउ. ४१.२१ )
होरपळल्यासारखा रखरखीत काळवंडलेला चेहरा ज्याचा दिसतो तो. (पायी दीर्घ प्रवास करून थकलेला.)

**संभोग**–पु., ( **स्रक्चन्दनादीनाम्** ) **उपभोगः** ( सुचि. ३९.३५ )
फुलांच्या माळा, चंदन इत्यादींचा उपभोग, विलास, सुखोपभोग.

**संभोजन**–न., **यथेष्टभोजनम्** ( सुचि. १७.४५-४६ )
**" पथ्यापथ्यमिहैकत्र भुक्तं संभोजनं मतम् "** ( सुचि. १.२७ )
यथेच्छ जेवण. पथ्य अपथ्य सर्व प्रकारचे पदार्थ मिळून आहार घेणे.

**संभोज्य**–न., **भैषज्यकाल० संभुक्तम्**(चचि. ३०.३०१)
औषधाची वेळ. पहा 'संभुक्त'

**संमर्दन**–न., **उपक्रम० सम्यक् समन्ततो वाऽङ्गानां मर्दनम्, व्यायामादिभिः श्रान्तानां श्रमहरमेतत्** ( र. ३०.९४.९५ )
एक उपचार. सर्व अंग चांगल्या तऱ्हेने रगडणे. व्यायाम इत्यादी श्रमाच्या कामांनी थकलेल्याचा थकवा घालविणारे हे आहे.

**संमित**–वि., **तुल्यम्** ( चशा. ५.३ ) तुल्य. बरोबरीचे.

**संमीलितद्रुम**–पु., **पुनर्नवाभेदः, रक्ता पुनर्नवा** ( रा. ५.४०८; पृ. ६३ ) द्र० '**पुनर्नवा**'
पुनर्नवाप्रकार, तांबडा पुनर्नवा.

**संमूढ**–वि., **संयुक्तम्** ( चचि. १३.१८७ )
संयुक्त. एकत्र झालेले.
**पिच्चितावनतम्** ( ड. सुनि. १४.८ )
पिचलेले व खाली वाकलेले ( भंगलेले हाड ).

**–पिडका**–स्त्री., **क्षुद्ररोग० शूकदोषजविकारेष्वेकः, तल्लक्षणम्–पाणिभ्यां भृशसंमूढे लिङ्गे पिडकेयं भवति । सा च वातरक्तसंभवा** ( सुनि. १४.८ )
एक हलका रोग. एक पुळी. शिश्न मोठे करण्याकरिता केलेल्या चुकीच्या उपचारांपासून हा होतो. हाताने अतिशय लिंग चुरगळले–चोळले तर ही पुळी होते, ही वात व रक्त दोषामुळे होते.

**संमूर्च्छित**–वि., **संमिश्रितम्, एकीभूतम्** ( चचि. १.५२ )
**मिलितम्** ( ड. सुचि. ३८.३८ )
मिसळलेले, एक झालेले, मिश्रित.
**वृद्धिं गतम्, प्रवृद्धम्** ( ड. सुनि. ११.१३-१४ )
वाढलेले. खूप वाढलेले.

**संमोह**–पु., **संमूढता भ्रमः** ( सुसू., ५.१० )
मोहित होणे, विचारशक्ति कुंठित होणे, भ्रम.
**लक्षण० असंमोहविषये मोहः** ( चनि. ७.६ )
ज्याबद्दल मोह असू नये त्याबद्दल मोह वाटणे.
**रोग० मूर्च्छा** ( ड. सुउ. ३९.२९९; असंसू. ५.१८ )
मूर्च्छा, बेशुद्धि.

**संमोहित**–वि., **लक्षण० मूर्च्छितः, अवष्टब्धः** (सुनि. ८.३)
बेशुद्ध, मूर्च्छित.

**सम्यक्**–अव्य., **सुष्ठु, यथायोगम्** ( सुशा. २.१०-११ )
चांगले, यथायोग्य, जसे पाहिजे तसे. अनुरूप.

**–पीत**–वि., **युक्तमात्रया पीतः ( धूमादिः )** ( चसू. ५.३७-३८ )
योग्यप्रमाणाने प्यालेला. शरिराला आरोग्याकरिता आवश्यक तितकेच प्यालेला,

**–योग**–पु., **समुचितः प्रयोगः, यथास्वरूपस्थितिः, आरोग्यकारणम्, ( अरु. ) असम्यग्योगाद्विपरीतः** ( अहृसू. १.१९ )
योग्य योग. शरीर स्वास्थ्याला हवा तेवढाच संपर्क–संबंध येणे. शरिराच्या आरोग्याकरिता आवश्यक तितकाच संपर्क–संबध–संयोग–ग्रहण होणे.

**–वमित**–वि., **सम्यग्रीत्या वमितः कृतोचितोद्वमनः** ( चसि. १.१५-१६ ) द्र० '**वमन**'
जितक्या प्रमाणात कफपित्त बाहेर घालवणे. आवश्यक होते तितके घालवण्यास योग्य इतक्याच वांत्या झालेला रुग्ण.

**–विपक्व**–वि., **समीचीनं पक्वम् ( अन्नम् )** ( सुसू. ४६.५२७ )
चांगले शिजलेले. योग्य शिजलेले (अन्न).

**–विरिक्त**–वि., **सुविरिक्तः** ( चसि. १.१७-१८ ) द्र० '**विरेचन**'
शरिरात वाढलेले पित्तादिदोष काढून टाकण्यास आवश्यक इतके रेच झालेला रुग्ण.

**–संबुद्ध**–वि , **सम्यक्तत्त्वज्ञः ( बुद्धादिः )** ( अहृसू. १८.१७ ३/२ )
चांगला तत्त्वज्ञ, खरा तत्त्वज्ञ (बुद्ध इत्यादी).

**–स्निग्ध**–वि., **सुष्ठु स्निग्धः** ( सुचि. ३१.५३; अहृसू. २०.२३ )
योग्य प्रमाणात स्निग्ध. शरिरातील दोष क्लिन्न करण्याला आवश्यक इतक्या प्रमाणात स्निग्ध झालेला.

**( सम्यग् )–दग्ध**–न., **चतुर्विधाग्निदग्धेष्वेकम्** ( सुसू. १२.१६; अहृसू. ३०.३४. असंसू. ४०.७) द्र० '**अग्निदग्ध**'
चार प्रकारच्या डाग देण्याच्या पद्धतीतील एक प्रकाचा डाग. रोगाचा उपशम होण्याला योग्य इतकाच डाग. पहा 'अग्निदग्ध'

**सम्यगनुपान**–न., **सुयोग्यमनुपानम्, तद्गुणाः–बृंहणं वृष्यं रोचनं तर्पणं दोषसंघातभेदनं मार्दवकरं श्रमक्लमहरं दीपनं पिपासाच्छेदनं वर्णकरं बल्यं दोषशमनं च** ( सुसू. ४६.४३५-४३८ )
अनुरूप अनुपान. सुयोग्य अनुपान. आवश्यक अनुपान. गुण— दोषाचा संघातनाशक. दोषशामक, अग्निदीपक, रुचकर, बलवर्धक, तृप्तिकर, पौष्टिक, शुक्रधातूला हितकर, शरीर मृदु करणारे,

थकवा (गळाठा) कमी करणारे, तहाननाशक व वर्ण सुधारणारे.

**( सम्यङ् )–निवेशन**–न., यथास्थानं स्थापना ( सुचि. २.३२ )
निखळलेले हाड किंवा सरकलेला अवयव स्वस्थानी बसवणे.

**सर**–पु., **गुण० रेचनकरो गुणः** ( चशा. ६.१० ) **अनुलोमनम्** ( सुचि. ३३.३३; अहृसू. १.१८ )
रेचन करणारा गुण. शरिरातील मळ, दोष, धातु बाहेर काढणारा गुण. ज्या मार्गाने मळ, वात बाहेर जावयाचे त्या मार्गाने त्याची प्रवृत्ति निर्माण करणे.
**दध्युपरितनस्नेहः** ( चसू. २७.२२८ )
दह्याच्या वरचा स्नेह, साय, मलई घेणे.
**मलपित्तहरो गुणः** ( सुचि. ५.४०-२ )
देहाच्या अधोभागाने मल आणि पित्त हरण करणारा गुण.
**वनस्पति० महापिण्डीतरुः** ( सुचि. ७.९-१२; रापरि. ९.३३ )
एक वृक्ष.
**कुधान्य० सरकर्णिका** ( सुसू. ४६.२१ )
एक कदान्न. तृणधान्याचा एक प्रकार. ( बरटी )

**(सरा)**–स्त्री., **वनस्पति० प्रसारणी** ( रा. ५.४३४ )
चांदवेल.

**–प्रकर्ष**–पु., **गुण० व्यवायी** ( असंसू. १.४१ )
शरिरात झटकन पसरण्याचा गुण. शरिरात पसरून नंतर पचन होणारा.

**सरक**–पु., **आसुत० सुरा** ( रा. १४.३०३ )
दारूचा प्रकार.
न., **जलपूर्णपात्रम्** ( सुसू. १३.१९ ) **मृण्मयपात्रम्** ' **शरावः** ' ( सुचि. ४.२८ )
मातीचे भांडे, शराव, पाण्याने भरलेले भांडे.

**सरक्त**–पु., **वनस्पति० ताम्रकण्टकः रक्तखदिरः** द्र० ' **खदिर** ' ( रा. ८.३६ ) तांबडा खैर.

**–पर्यन्त**–वि., **पर्यन्तो मर्यादा, रक्तवर्णा मर्यादा यस्य सः** ( चचि. ५.४२ )
ज्याची कडा तांबडी आहे असा.

**–मूत्रत्व**–न., **लक्षण० रक्तेन सह मूत्रं यस्य सः, तस्य भावः** ( चचि. ११.१३ ) रक्तयुक्त लघ्वी होणे.

**सरज**–न., **भैषज्य० सौवीराख्यमञ्जनम्, रालम्** ( र. २३.४१ )
सौवीर नावाचे अंजन. सुरमा. राळ.

**सरट**–पु., **प्राणि० कृकलासः** ( र. २४.१३७ ) सरडा.

**सरणशील**–वि., **गमनशीलम्** ( **मात्स्यसत्वम्** ) ( चशा. ४.३९ (२) गमनशील, गतिशील, गतिमान, चंचल, मात्स्यसत्व लक्षण.

**सरणी**–स्त्री., **वनस्पति० प्रसारणी** ( ध. १.२८९ )
चांदवेल.

**सरप्रकर्ष**–पु., **गुण० व्यवायी** ( असंसू. १.४१ )
जे प्रथम शरीरभर पसरून नंतर पचणारे द्रव्य असते ते व्यवायी गुणाचे होय. व्यवायीचे दुसरे नाव सरप्रकर्ष.

**सरल**–पु., **वनस्पति० देवदारुः, तद्गुणाः–तिक्तः कटुरुष्णः स्निग्धः, कोष्ठशुद्धिकरः कफवातघ्नः वक्त्रस्रावस्वरभ्रंशनेत्ररोगव्रणत्वग्दोषशोफकण्डूतिहरश्च** ( ध. ३.७८; चक. १.२३; सुचि. ३८.२५; अहृसू. १५.२६ )
हिं.—धूपसरल.
**म.—सुरूचे झाड.**
गु.—सरलदेवदार.
बं.—सरलगाछ.
देवदार, सुरू० गुण–कडु, तिखट, उष्ण, स्निग्ध, कोठ्याची शुद्धी करणारा, कफवातनाशक, तोंडाची लाळ गळणे, घसा बसणे, डोळ्याचे व्रण, त्वचारोग, सूज व खाज नाशक.

**( सरला )**–स्त्री., **वनस्पति० त्रिवृत्** ( चचि. १३.१५९; सुचि. २२.५५ ) **अरुणमूला त्रिवृत्** (सुसू. ३७.६)
नळीचे तेड, लाल तेड.
**धूपकाष्ठम्** ( सुचि. २५.१९ ) धूपाचे लाकूड.
**शुक्रभाण्डी** ( ध. १.२४५ ) काळे तेड. एक प्रकार.

**–स्नेह**–न., **सरलवृक्षसारतैलम्** ( सुसू. ४५.१२३ ) **गुणाः–कषायं, तिक्तं, कटुकं, व्रणशोधनं च** ( असंसू. ६.३०६ )
देवदाराचे तेल. देवदाराच्या नाराचे तेल. तुरट, कडु, तिखट, व्रणशोधक.

**सरलाङ्ग**–पु., **वनस्पति० श्रीवेष्टकः** ( रा. १२.१९३ )
धूपाचे झाड, राळ वृक्ष.

**सरस्**–न., **जलाशय० दिव्यखातं पुरुषव्यापारं विना जातं तत्पुनः पम्पादि** ( चक. चसू. २७.२१४; सुसू. ४५.४ )
सरोवर. माणसांच्या श्रमावाचून आपोआप झालेला पाण्याचा संचय. जसे पंपासरोवर.

**( सरो )–रुह**–न., वनस्पति० **रक्तपद्मम्** ( ध. ४.१५.२ )
तांबडे कमळ, पद्म.

**(–रुहा )**–स्त्री., वनस्पति० **पद्मिनी** ( ध. ४.१५७ )
कमळिणी.

**सरस**–वि., **अभृष्टः** ( चसू. २७.२७३ ) न भाजलेला.
**वनस्पति० काष्ठागरु** ( र.२२.१६७ )
अगरू, लाकड्या अगरू.

**( सरसा )**–स्त्री., वनस्पति० **सहस्रवीर्या महाशतावरी** ( रा. ४.४४१ )
मोठी शतावरी.

**( सरसी )**–स्त्री., **तुम्बरपत्रिका** ( अरु. ) **कपित्थपर्णी** ( हे. अहृसू. १५.३०; असंसू. १६.२४ )
एक वनस्पती. कवठाच्या पानासारखी पाने असलेली.

**सरसा**–स्त्री., **प्रिया स्त्री** । आवडती स्त्री.

**–संमतदेश**–वि., **सरसाः प्रियाः तासां संमतः ( देशः )** ( चचि. २४.१३ )
प्रिय स्त्री जनांना पसंत असलेले ( शयन, आसन. )

**सरसिज**–न., वनस्पति० **कमलम्** ( रा. १०.२४४ )
कमळ, सरोवरात जन्मलेले.

**सरसीरुह**–न., वनस्पति० **कमलम्** ( रा. १०.२४३ )
कमळ. सरोवरात वाढणारे, रुजणारे.

**सरस्वती**–स्त्री., वनस्पति० **ज्योतिष्मती** ( रा. ३.३९५ )
मालकांगोणी.
**ब्राह्मी** ( रा. ५.१४७ ) ब्राह्मी.
**वाक्** ( चसि. ११.११ ) वाचा, विधान, म्हणणे.

**सरावकुर्दि**–पु., कीट० **शरावकुर्दः** ( सुक. ३.५ )
एक किडा.

**सरित्**–स्त्री., **नदी** ( सुचि. ३०.३४ ) नदी.

**–पतिफल**–न., **समुद्रफलम्** ( र. १२.१२१-२२ )
समुद्रफळ.

**सरीसृप**–पु., प्राणि० **सर्पादिः** ( चचि. ३.७(३). सुचि. १.३ )
सर्प इत्यादी. सरपटणारे प्राणी.

**सरीसृपोरग**–पु., सर्प० **अत्यर्थसर्पणशील उरगः** ( चक्र. चचि. ३.३६ )
एक सर्प, अतिशय सरपटणारा सर्प.

**सरुग्गात्र**–वि. **वेदनायुतावयवः** ( सुचि. ५.१९ )
वेदनायुक्त अवयव.

**सरूपता**–स्त्री., **सादृश्यम्, तच्च द्विविधम्—शरीरसादृश्यं मनःसादृश्यं च** ( चशा. २.२२ )
सादृश्य, सारखेपणा. दोन प्रकार. शरीर सादृश्य व मनाचे सादृश्य.

**सरेतस्**–वि., **सशुक्रम्** ( सुशा. २.४४ ) शुक्रयुक्त.

**सर्ज**–पु., वनस्पति० **सर्जकः** ( ध. ५.१२३ ) राळ.
**निर्यास० सर्जरसः** ( चसू. ३.५; सुसू. ३८.२४-२५; असंसू. ३६.१० )
राळ.
**रालः** ( र. २.१६६-६८ ) राळ.
**नेत्ररोगेषूपयुक्तः, श्लेष्माऽक्षिरोगेषु वर्तिनिर्माणोपयोगि द्रव्यम्** ( असंउ. १९ )
कफज नेत्ररोगात अंजनासाठी वर्ति निर्माण करण्यास लागणारे एक द्रव्य. राळ.

**–निर्यासक**–पु., वनस्पति० **निर्यास० रालः** ( रा. १२.१७७ )
राळ.

**–रस**–पु., वनस्पति० **सर्जकः** ( रा. ९.२०४; चसू. ३.१०; असंशा. ३.२० )
राळ.

**सर्जक**–पु., वनस्पति० **गुणाः—कषायः, कटुस्तिक्त उष्णः रूक्षो, वर्ण्यः, श्लेष्मवातपित्तघ्नः, कुष्ठकण्डूकृमिरुजाऽतीसारविस्फोटहरश्च** ( ध. ५.१२३; सुक. ६.३; र. २३.३७ ) **नेत्ररोगेषूपयुक्तः** ( असंउ. १९ ) नेत्र रोगात उपयोगी.
हिं.—शालभेद.
**म.—राळेचा वृक्ष.**
राळ, राळेचा वृक्ष. गुण—तुरट, तिखट, कडु, उष्ण, रूक्ष, वर्ण चांगला करणारा, त्रिदोषघ्न, कुष्ठ, कंडू, कृमि, वेदना, अतीसार, फोड नाहीसे करणारा.

**( सर्जिका )**–स्त्री., भैषज्य० **सर्जिकाक्षारः** ( ध. २.२०; चचि. ७.११४ )
सज्जीखार.

**सर्जिका**–स्त्री.,

**–क्षार**–पु., क्षार० **गुणाः—कटुः, क्षाररसः, उष्णस्तीक्ष्णः, वातकफघ्नः, गुल्माऽऽध्मानकृमिमान्द्यमेदोरोगजठरव्रणहरश्च** ( ध. २.२० )
सज्जीखार. गुण—तिखट, खारट, उष्ण, तीक्ष्ण, वातकफनाशक, गुल्म, पोटफुगी, कृमि, अग्निमांद्य, मेदोरोग, पोटातील व्रण नाशक.

**सर्जिकादिचूर्ण**–न., योग० **सर्जिकातुत्थकासीसं शैलेयं रसाञ्जनं मनःशिलासमैश्चूर्णम् । तद्व्रणवीसर्पनाशं करोति** ( सुचि. १९.४५-४६ )

सज्जीखार इत्यादी चूर्ण. सज्जीखार, मोरचूद, शिलाजतु, रसांजन, मनशीळ समभाग. व्रण, धावरे नाशक.

**सर्प**–पु., प्राणि० बिलेशयोऽयम्, अशीतिसर्पाः–ते पुनः पञ्चविधाः; दर्वीकराः, मण्डलिनः, राजिमन्तः, निर्विषाः, वैकरञ्जाश्चेति । दर्वीकराः फणावन्तः, मण्डलिनः–फणावर्जिताः–विविधमण्डलैश्चित्रिताः, राजिमन्तो रेखायुक्ताः, फणावर्जिता ईषद्विषा पुण्डरिकादयः, निर्विषा गललोमीशूकपत्रादयः, वैकरञ्जाः; संकीर्णजाताः–ते च पृथग्जातीयसर्पिणीपृथग्जातीयसर्पाभ्यामुत्पन्नाः। तत्र दर्वीकराः षड्विंशतिः, मण्डलिनो द्वाविंशतिः, राजिमन्तो दश, निर्विषा द्वादश, वैकरञ्जास्त्रयः । चित्रा मण्डलराजिला वैकरञ्जोद्भवाः सप्त भवन्ति । एते सर्पाः पादाभिमृष्टाः स्वभावदुष्टा वा ग्रसनार्थिनोऽपि वा महाक्रोधा भीमदर्शनास्त्रिविधं दशन्ति । तत्र रदितं सर्पितं निर्विषं चेति दंशत्रैविध्यम् । सर्पाङ्गाऽभिहतमपि केचित्तद्विदो दंशप्रकारमिच्छन्ति। यत्र दन्तानां क्षतानि एकं द्वे बहूनि वा निमग्नानि यान्यल्परक्तानि चञ्चुमालकयुक्तानि वैकृत्यकरणानि च, संक्षिप्तानि सशोफानि च क्षतानि यत्र सन्ति, तत् सर्पितं विद्यात् । तच्चाऽत्यवगाढम् । यस्मिन्देशे सलोहिता राज्यो नीलाः पीतास्तथा सितास्तद्रदितं विज्ञेयम् । तच्चाऽल्पविषम् । यत्र प्रकृतिस्थस्य देहिन अशोफमल्पदुष्टाऽसृक् क्षतं क्षतानि वा सन्ति तद् अविषं विद्यात् । सर्पस्पृष्टस्य भीरोर्भयेन कुपितो वातः शोफं कुरुते । तत् सर्पाङ्गाऽभिहतं विद्यात् । व्याधितोद्विग्नसर्पाणां दष्टान्यल्पविषाणि सन्ति । तथैवाऽतिवृद्धबालसर्पाभिदष्टमल्पविषं स्मृतम् । सुपर्णदेवब्रह्मर्षियक्षसिद्धनिषेविते देशे तथा विषघ्नौषधियुक्ते च देशे विषं न क्रमते । दर्वीकराः सर्पाः फणिनः शीघ्रगामिनः चक्रलाङ्गलच्छत्रस्वस्तिकाङ्कुशधारिणः सन्ति । मण्डलिनस्तु पृथवः विविधैर्मण्डलैश्चित्रा मन्दगामिनो ज्वलनाऽर्कसमप्रभा राजिमन्तश्च विविध र्णाभिः राजिभिस्तिर्यगूर्ध्वं चित्रिता इव भान्ति ( सुक. ४.९-२४ ) ब्राह्मणादिलक्षणानि–ये कपिला मुक्तारूप्यप्रभाः सुगन्धयः सुवर्णाभास्ते सर्पा जात्या ब्राह्मणाः स्मृताः । ये च स्निग्धवर्णा भृशकोपना येषां सूर्यचन्द्राकृतिच्छत्रलक्ष्म विद्यते तथाऽम्बुजं विद्यते, ते क्षत्रियाः सर्वे । कृष्णा वज्रनिभा वर्णतो लोहिता धूम्राः पारावताभाश्च सर्पा वैश्याः स्मृताः । ये महिषद्वीपिवर्णाभाः परुषत्वचो भिन्नवर्णाश्च ते शूद्राः परिकीर्तिताः । सर्वे सर्पा फणिनः जन्तोर्वातं कोपयन्ति । मण्डलिनश्च पित्तम्, अनेकराजयः कफं कोपयन्ति । असवर्णाभ्यामपत्यं द्विदोषकरलक्षणं करोति । रात्रेः पश्चिमे यामे सर्पाश्चित्राश्चरन्ति । शेषेषु यामेषु मण्डलिनो, दिवा दर्वीकराश्चरन्ति । तरुणा दर्वीकरा वृद्धा मण्डलिनो वयोमध्या राजिमन्तो मृत्युहेतवो भवन्ति । नकुलाऽऽकुलिता बाला वारिविप्रहताः कृशा वृद्धा मुक्तत्वचो, भीताश्च सर्पा अल्पविषाः स्मृताः

( सुक. ४.२५-३३ )

दर्वीकरभेदाः–कृष्णसर्पो, महाकृष्णः, कृष्णोदरः, श्वेतकपोतो, महाकपोतो, बलाहको, महासर्पः, शङ्खकपालो, लोहिताक्षो, गवेधुकः, परिसर्पः, खण्डफणः, ककुदः, पद्मो, महापद्मो, दर्भपुष्पो, दधिमुखः, पुण्डरीको, भ्रुकुटीमुखो, विष्किरः, पुष्पाभिकीर्णो, गिरिसर्पः, ऋजुसर्पः, श्वेतोदरो, महाशिराः, अलगर्दः, आशीविष इति । मण्डलिनस्तु–आदर्शमण्डलः, श्वेतमण्डलो, रक्तमण्डलश्चित्रमण्डलः, पृषतो, रोध्रपुष्पो, मिलिन्दको, गोनसो, वृद्धगोनसः, पनसो, महापनसो, वेणुपत्रकः, शिशुको, मदनः, पालिन्दिरः, पिङ्गलस्तन्तुकः, पुष्पपाण्डुः, षडङ्गोऽग्निको, बभ्रुः, कषायः, कलुषः, पारावतो, हस्ताभरणश्चित्रक, एणीपद इति। राजिमन्तस्तु–पुण्डरीको राजिचित्रोऽङ्गुलिराजिर्बिन्दुराजिः, कर्दमकस्तृणशोषकः, सर्षपकः, श्वेतहनुर्दर्भपुष्पकश्चक्रको, गोधूमकः, किक्किसाद इति । निर्विषास्तु–गलगोली, शूकपत्रोऽजगरो, दिव्यको, वर्षाहिकः, पुष्पशकली, ज्योतीरथः, क्षीरिकापुष्पकोऽहिपताकोऽन्धाहिको, गौराहिको, वृक्षेशय इति । वैकरञ्जास्तु त्रयाणां दर्वीकरादीनां व्यतिकराज्जाताः, तद्यथा–माकुलिः पोटगलः स्निग्धराजिरिति । तत्र, कृष्णसर्पेण गोनस्यां वैपरीत्येन वा जातो माकुलिः, राजिलेन गोनस्यां वैपरीत्येन वा जातः पोटगलः, कृष्णसर्पेण राजिमत्यां वैपरीत्येन जातः स्निग्धजातिरिति । तेषामाद्यस्य पितृवद्विषोत्कर्षः, द्वयोर्मातृवदित्येके । त्रयाणां वैकरञ्जानां पुनर्दिव्येलकरोध्रपुष्पकराजिचित्रकपोटगलपुष्पाभिकीर्णदर्भपुष्पवेल्लितकाः सप्त ।

तेषामाद्यास्त्रयो राजिलवच्छेषा मण्डलिवत्, एवमेतेषां सर्पाणामशीतिर्व्याख्याता ( सुक. ४.३४ ) तत्र महानेत्रजिह्वाऽऽस्यशिरसः पुमांसः, सूक्ष्मनेत्रजिह्वाऽऽस्यशिरसः स्त्रियः, उभयलक्षणा मन्दविषा अक्रोधा नपुंसका इति। तत्र सर्वेषां सर्पाणां सामान्यत एव दष्टलक्षणम्—विषं हि निशितनिस्त्रिंशाशनिहुतवहदेश्यमाशुकारि मुहूर्तमप्युपेक्षितमातुरमतिपातयति, न चावकाशोऽस्ति वाक्समूहमुपसर्तुं प्रत्येकमपि दष्टलक्षणेऽभिहिते सर्वत्र त्रैविध्यं भवति। त्रैविध्यं च–एतद्धातुरहितमसंमोहकरं चापि च, अत्रैव सर्वसर्पव्यञ्जनाऽवरोधः ( सुक. ४.३५-३६ ) तत्र दर्वीकरविषेण त्वङ्नयननखदशनवदनमूत्रपुरीषदंशकृष्णत्वं रौक्ष्यं शिरसो गौरवं सन्धिवेदना कटीपृष्ठग्रीवादौर्बल्यं जृम्भणं वेपथुः स्वराऽवसादो घुर्घुरको जडता शुष्कोद्गारः कासश्वासौ हिक्का वायोरूर्ध्वगमनं शूलोद्वेष्टनं तृष्णा लालास्रावः फेनाऽऽगमनं स्रोतोऽवरोधस्तास्ताश्च वातवेदना भवन्ति। मण्डलिविषेण त्वगादीनां पीतत्वं शीताऽभिलाषः परिधूपनं दाहस्तृष्णा मदो मूर्च्छा ज्वरः शोणितागमनमूर्ध्वमधश्च मांसानामवशातनं श्वयथुर्दंशकोथः पीतरूपदर्शनमाशुकोपस्तास्ताश्च पित्तवेदना भवन्ति। राजिमद्विषेण शुक्लत्वं त्वगादीनां शीतज्वरो रोमहर्षः स्तब्धत्वं गात्राणामादंशशोफः सान्द्रकफप्रसेकश्छर्दिरभीक्ष्णमक्ष्णोः कण्डूः, कण्ठे श्वयथुर्घुर्घुरकं उच्छ्वासनिरोधस्तमःप्रवेशस्तास्ताश्च कफवेदना भवन्ति। पुरुषाऽभिदष्ट ऊर्ध्वं प्रेक्षते, अधस्तात् स्त्रिया; सिराश्चोत्तिष्ठन्ति ललाटे, नपुंसकाऽभिदष्टस्तिर्यक्प्रेक्षी भवति, गर्भिण्या पाण्डुमुखो ध्मातश्च, सूतिकया कुक्षिशूलाऽऽर्तः सरुधिरं मेहत्युपजिह्विका चाऽस्य भवति, ग्रासार्थिनाऽन्नं काङ्क्षति, वृद्धेन चिरान्मन्दाश्च वेगाः बालेनाऽऽशु मृदवश्च, निर्विषेणाऽविषलिङ्गं अन्धाहिकेनाऽन्धत्वमित्येके, ग्रसनादजगरः शरीरप्राणहरो न विषात्। तत्र सद्यः प्राणहराऽहिदष्टः पतति शस्त्राऽशनिहत इव भूमौ स्रस्ताङ्गः स्वपिति। तत्र सर्वेषां सर्पाणां विषस्य सप्त वेगा भवन्ति तत्र, दर्वीकराणां प्रथमे वेगे विषं शोणितं दूषयति, तद् प्रदुष्टं कृष्णतामुपैति, तेन कार्ष्ण्यं पिपीलिकापरिसर्पणमिव चाऽङ्गे भवति। द्वितीये मांसं दूषयति, तेनाऽत्यर्थं कृष्णता शोफो ग्रन्थयश्चाऽङ्गे भवन्ति। तृतीये मेदो दूषयति तेन दंशक्लेदः शिरोगौरवं स्वेदश्चक्षुर्ग्रहणं च। चतुर्थे कोष्ठमनुप्रविश्य कफप्रधानान् दोषान् दूषयति, तेन तन्द्राप्रसेकसंधिविश्लेषा भवन्ति। पञ्चमेऽस्थीन्यनुप्रविशति प्राणमग्निं च दूषयति, तेन पर्वभेदो हिक्का दाहश्च भवति। षष्ठे मज्जानमनुप्रविशति ग्रहणी चाऽत्यर्थं दूषयति, तेन गात्राणां गौरवमतीसारो हृत्पीडा मूर्च्छा च भवति। सप्तमे शुक्रमनुप्रविशति व्यानं चाऽत्यर्थं कोपयति कफं च सूक्ष्मस्रोतोभ्यः प्रच्यावयति, तेन श्लेष्मवर्तिप्रादुर्भावः कटीपृष्ठभङ्गः सर्वचेष्टाविघातो लालास्वेदयोरतिप्रवृत्तिरुच्छ्वासनिरोधश्च भवति। मण्डलिनां प्रथमे वेगे विषं शोणितं दूषयति तत् प्रदुष्टं पीततामुपैति, तत्र परिदाहः पीतावभासता चाङ्गानां भवति। द्वितीये मांसं दूषयति, तेनाऽत्यर्थं पीतता परिदाहो दंशे श्वयथुश्च भवति। तृतीये मेदो दूषयति, तेन पूर्ववच्चक्षुर्ग्रहणं तृष्णादंशक्लेदः स्वेदश्च। चतुर्थे कोष्ठमनुप्रविश्य ज्वरमापादयति। पञ्चमे परिदाहं सर्वगात्रेषु करोति। षष्ठसप्तमयोः पूर्ववत्। राजिमतां प्रथमे वेगे विषं शोणितं दूषयति। तत् प्रदुष्टं पाण्डुतामुपैति, तेन रोमहर्षः शुक्लावभासश्च पुरुषो भवति। द्वितीये मांसं दूषयति, तेन पाण्डुताऽत्यर्थं जाड्यं शिरःशोफश्च भवति। तृतीये मेदो दूषयति, तेन चक्षुर्ग्रहणं दंशक्लेदः स्वेदो घ्राणाक्षिस्रावश्च भवति। चतुर्थे कोष्ठमनुप्रविश्य मन्यास्तम्भं शिरोगौरवं चाऽऽपादयति। पञ्चमे वाक्सङ्गं शीतज्वरं च करोति। षष्ठसप्तमयोः पूर्ववदिति ( सुक. ४.३७-३९; चचि. २३.१६४; असंउ. ४८ ) सप्तकलासु एकैकामतिक्रम्य विषं वेगं प्रकुरुते। सर्पदंशेन प्रथमे वेगे पशुः शूनाङ्गो दुःखितः सन् ध्यायति। द्वितीये वेगे लालास्रावः कृष्णाङ्गः सन् हृदि पीड्यते। तृतीये शिरोदुःखं भवति कण्ठग्रीवं च भज्यते। चतुर्थे वेगे मूढो दन्तान् खादन् वेपते। असून् जहाति। पक्षी प्रथमे विषवेगे ध्यायति। अतः परं मुह्यति। द्वितीये विह्वलस्तृतीये मृत्युमृच्छति। मार्जारनकुलादीनां विषं नातिप्रवर्तते ( सुक ४.४२-४५ ) सर्पविषचिकित्सा–सर्वैरेव सर्पैः शाखादष्टस्य देहिन आदितो दंशस्योपरि चतुरङ्गुले अरिष्टा बध्नीयात्। अरिष्टा

नाम वस्त्रादिभिः मन्त्रपुरस्कृतैर्बन्धः । अथवा मृदुना प्लोतचर्मान्तवल्कानामन्यतमेन दंशान् बध्नीयात् । अरिष्टाभिर्निवारितं विषं देहं न गच्छति ( सुक. ५.३-४ ) यत्र बन्धो न संभवति, तत्र दंशमुत्कृत्य दहेत् । सर्वत्रैवाऽऽचूषणच्छेददाहाः पूजिताः ( सुक. ५.५-६ ) अपि तु मण्डलिना दष्टं न कथंचन दाहयेत् । यतः पित्तबाहुल्यविषादंशो दाहाद्विसर्पते ( सुक. ५.७ ) देवब्रह्मर्षिभिः प्रोक्ता मन्त्राः सुदुस्तरं विषं हन्युः । मन्त्रस्याऽसिद्धावगदक्रमो योज्यः ( सुक. ५.१३ ) रक्तविस्रावणमपि कार्यं रक्ते निर्ह्रियमाणे कृत्स्नं विषं निर्ह्रियते (सुक. ५.१४) दंशं प्रच्छयित्वाऽगदैः प्रलेपयेत् । चन्दनोशीरयुक्तेन वारिणा परिषेचयेत् । ( सुक. ५.१६ ) तैलकौलत्थमद्यसौवीरकाणि न पिबेत् । अन्यत्तु द्रवं किञ्चित् पीत्वा पीत्वा तदुद्वमेत् । प्रायः वमनेनैव विषं सुखं निर्ह्रियते ( सुक. ५.१८-१९ ) फणिनां प्रथमे विषवेगे शोणितं हरेत् । द्वितीये वेगे मधुसर्पिर्भ्यामगदं पाययेत् । तृतीये विषनाशने नस्यकर्माञ्जनं युञ्ज्यात । चतुर्थे वान्तं यवागूं दापयेत् । पञ्चमषष्ठयोरादौ शीतोपचारं कृत्वा तीक्ष्णं शोधनं यवागूं चापि पाययेत् । सप्तमे तीक्ष्णं नस्यमञ्जनं मूर्ध्नि च काकपदं कृत्वाऽसृग्वा पिशितं चर्म क्षिपेत् ( सुक. ५.२०-२३ ) मण्डलिनां प्रथमे वेगे दर्वीकरवदाचरेत् । द्वितीये मधुसर्पिर्भ्यामगदं पाययेत् । तृतीये तीक्ष्णशोधनं यवागूं दद्यात् । चतुर्थे पञ्चमे च दर्वीकरवदाचरेत् । षष्ठे मधुरमगदं पाययेत् सप्तमे विषनाशनोऽगदः पेयः ( सुक. ५.२४-२७ ) राजिमतां प्रथमे वेगेऽलाबुभिः शोणितं हरेत् । मधुसर्पिर्भ्यामगदं पाययेत् । द्वितीये वान्तं विषनाशनमगदं पाययेत् । तृतीयादिषु दर्वीकरवत् क्रिया कार्या । षष्ठे तीक्ष्णमञ्जनं सप्तमेऽवपीडश्च ( सुक. ५.२९ ) गर्भिणीबालवृद्धानां विषाऽऽर्तानां सिराव्यधनवर्जितं मृदु विधानं शस्यते (सुक. ५.३०) अजाविके नरतुल्यानि रक्तावसेकाञ्जनानि महिषे उष्ट्रे च त्रिगुणं गवाऽश्वे द्विगुणं नागानां चतुर्गुणं रक्ताऽवसेकादि कार्यम् । सर्वपक्षिणां नरविषहरद्रव्येण केवलं सुशीतान् परिषेकान् प्रदेहांश्चाऽवचारयेत् ( सुक. ५.३२ )

साप. बिळातला प्राणी. प्रकार ऐंशी. मुख्य प्रकार पाच. ( १ ) दर्वीकर— फणा असलेले सव्वीस. ( २ ) मंडली हे फणा नसलेले, मंडले असलेले. बावीस (३) रेषा अंगावर असलेले, फणा नसलेले ते राजीमंत— दहा. ( ४ ) थोडे विषम असलेले बारा. ( ५ ) भिन्न जातीच्या सर्प सर्पिणी पासून झालेले तीन. ( ६ ) वैकरंजांपासून झालेले, ज्यांच्यावर मंडले व रेषा असतात ते चित्र— सात असे एकूण ऐंशी. यांच्या संज्ञा वर दिल्या आहेत. या सर्पांवर पाय पडला की स्वभावाने दुष्ट व भयंकर दिसणारे असे ते अतिशय क्रुद्ध होऊन किंवा खाण्याच्या इच्छेनेही चावा घेतात. **दंश प्रकार**—(१)रदित (२) सर्पित ( ३ ) निर्विष. कोणी सर्पाच्या अंगाचा आघात हाही एक दंशाचा प्रकार मानतात. (१) ज्या दंशात सरक्त, निळ्या, पिवळ्या तशाच पांढऱ्या रेषा दिसतात ते रदित. हा अल्प विषाचा दंश. ( २ ) जेथे दाताच्या जखमा एक, दोन किंवा अधिक आत गेलेल्या, थोडे रक्त बाहेर आलेल्या, सुजलेल्या, भोवताली वडाच्या पारंब्यांच्या टोकासारख्या विकारोत्पादक व सूक्ष्म ओळी. असतील तो दंश सर्पित होय. हा अतिशय खोल असतो. ( ३ ) जेथे सूज नाही, अल्प रक्त असलेले क्षत किंवा क्षते असतात तेथे तो दंश बिनविषारी ( निर्विष ) समजावा. ( ४ ) सर्पाचा स्पर्श झालेल्या भित्र्याचा वात भीतीमुळे प्रकुपित होऊन सूज करतो, त्याला सर्पांगाभिहत असे म्हणतात. **अल्प विषारी दंश**— अतिवृद्ध, बालरोगी, उद्विग्न सर्पाचा दंश अल्प विषाचा असतो. गरुड, देव, ब्रह्मर्षि, यक्ष सिद्ध असलेल्या स्थानात तसेच विषघ्न औषधियुक्त भागात विष अधिक चढत नाही. **स्वरूप व स्वभाव**. ( १ ) **दर्वीकर**—नागांना फणा असते. ते वेगाने जातात. चक्र, नांगर, छत्र, स्वस्तिक, अंकुश अशी चिन्हे फणेवर असतात. ( २ ) **मंडली**— जाड, अनेक मंडळांनी युक्त, मंद वेगाचे, अग्नि व सूर्य यासारखे तेजस्वी दिसतात. ( ३ ) **राजीमंत**— नाना प्रकारच्या रंगांच्या रेषांनी- पट्ट्यांनी ( तिरक्या वर जाणाऱ्या अशा ) युक्त असतो.

**वर्णदृष्ट्या ब्राह्मणादि चार प्रकार**— (१) ब्राह्मण (२) क्षत्रिय (३) वैश्य (४) शूद्र. वर्ण स्वभावाचे चार प्रकार होतात. **ब्राह्मण**— कपिल, मोती किंवा रुप्यासारखे श्वेतवर्ण, सोन्यासारखी पिवळी छटा असणारे. **क्षत्रिय**— जे तुकतुकीत,

अत्यंत रागीट, ज्यांच्यावर सूर्य, चंद्र, छत्र किंवा कमळाचे चिन्ह असते ते. **वैश्य**— काळे, हिऱ्याच्या रंगाचे, तांबूस, धुरकट, कबुतराच्य रंगाचे ते. **शूद्र**— जे म्हैस किंवा हत्तीच्या वर्णासारखे व खरखरीत त्वचेचे, निरनिराळ्या रंगाचे असतात ते. **दोषांचा प्रकोप**— फणावाले सर्व नागसर्प वातप्रकोपक. मंडली पित्तप्रकोपक. राजीमंत कफ व मिश्र वर्णाचे दोन दोषांचा प्रकोप करतात. **संचार काळ**— रात्रीच्या शेवटच्या प्रहरी वर्णसंकरी सर्प, रात्रीच्या बाकीच्या प्रहरात मंडली व दिवसा नाग संचार करतात. **विषवृद्धि वय**— तरुण वयाचे दर्वीकर नाग हे मृत्युकारक असतात. वृद्ध वयाचे मंडली व मध्यम वयाचे राजीमंत हे मृत्यूला कारण होतात. मुंगुसाशी झगडून सुटलेला सर्प, लहान सर्प, पाण्यातल्या प्रवाहात सापडून दमलेला सर्प, कृश–वृद्ध–कात निघालेला–भ्यालेला सर्प थोड्या विषाचा असतो. ऐशी प्रकारांची नांवे मुळात आहेतच. **लिंग भेद लक्षणे**— मोठे डोळे, तोंड, डोके व लांब जीभ असलेला सर्प पुरुष जातीचा. ही लक्षणे लहान असल्यास स्त्रीजातीचा. दोन्ही लक्षणांचा, मंद विषांचा व क्रोध थोडा असलेला नपुंसक होय. **दंशाचे सामान्य लक्षण**— वज्र, तरवार किंवा अग्नीसारखा शीघ्र परिणाम करणारा असून क्षणभरही उपेक्षा केल्याने शीघ्र प्राणनाश करतो. **दर्वीकरनाग चावल्याची लक्षणे**— त्वचा, डोळे, नखे, दात, तोंड, मूत्र, मळ व दंश हीं काळी, रूक्ष; डोके जड, सांधे दुखणे, कंबर - पाठ - मान दुबळी; जांभया, कंप, स्वर बसणे, घर घर आवाज, जडपणा, कोरड्या ढेकरा, श्वास, खोकला, उचकी, ऊर्ध्ववात, शूल, हातपाय वळणे, तहान, लाळ गळणे, फेस येणे, स्रोतसांचा अवरोध व निरनिराळ्या वाताच्या वेदना होतात. **मंडली**- ( धामण ) चावला तर त्याच्या विषाने त्वचा इत्यादींना पिवळेपणा थंडाव्याची इच्छा, सर्वांग तापणे, आग, तहान, माज, मूर्च्छा, ताप, रक्तस्राव, वरच्या व खालच्या अवयवांचे मांसल भाग लोंबणे, सूज जखम कुजणे, शीघ्रसंताप येणे, भोवतालचे पिवळे दिसणे, तसेच आणखी ती पित्ताची चिन्हे दिसणे. **राजीमंत चावला** तर त्वचा इत्यादीस पांढरेपणा, थंडी वाजून ताप, रोमांच, अवयव जखडणे, दंशावर सूज, दाट कफ तोंडातून पडणे, तोंडाला पाणी सुटणे, सारखी ओकारी डोळ्याला खाज, घशात सूज, घरघर, श्वास घेण्याला अडथळा, अंधेरी व त्या त्या कफाच्या वेदना होतात. पुरुष सर्प चावलेला रोगी वर पाहतो व स्त्री सर्प चावला असेल तर खाली पाहतो. कपाळावर शिरा उठून दिसतात. नपुंसक सर्प डसलेला रोगी तिरळा पाहतो. गर्भिणी सर्पीण चावली तर रोग्याचे तोंड पांढरे पडते व पोट फुगते. सर्पीण व्यालेली **असून** तिने दंश केला तर कुशीत दुखते, लघ्वीतून रक्त जाते व उपजिव्हिका नावाचा रोग होतो. भुकेलेला सर्प चावला तर त्या रोग्याला अन्नाची इच्छा होते. वृद्ध सर्प चावल्यास बऱ्याच वेळाने व मंद वेग येतात. बाल सर्प चावल्यास वेग लौकर लौकर पण सौम्य येतात. निर्विष सर्प चावल्यास विषाची चिन्हे होत नाहीत. आंधळा सर्प चावला तर रोगी आंधळा होतो. असे काही म्हणतात. अजगर हा विषाने प्राणघातक नसून तो शरीर गिळून प्राणनाश करतो.

**प्रकारानुरूप वेग ( लहरी ) व लक्षणे**– नागवेग.

( १ ) विष रक्ताला दूषित करते ते काळे होते म्हणून **काळेपणा** येतो.अंगात मुंग्या चावल्या सारखे होते. ( २ )दुसऱ्यात मांस दूषित होते. फार काळसरपणा, सूज, गाठी होतात. (३) मेददुष्टि. जखम ओली होते. डोके जड, घाम येणे, डोळे जखडणे. (४) कोठा दुष्ट होतो. कफदुष्टि व रोग होतात. झापड, तोंडाला पाणी, सांधे गळतात. (५) अस्थीत विष प्रवेश करते. अग्नी व जीवनांश दुष्ट करिते. त्याने पेरी फुटणे, उचकी, दाह होतात. (६) मज्जेत जाते. ग्रहणी अतीशय दुष्ट होते, त्यामुळे अवयव जड, अतीसार, हृदयात वेदना व मूर्च्छा होतात. ( ७ ) शुक्रात विष भिनते. व्यान अतिशय प्रकुपित होतो. कफ सूक्ष्म स्रोतसातून बाहेर पडतो. त्यामुळे कफाच्या वातीसारखा स्राव गुदातून होतो. कंबर, पाठ यात फूट लागते. सर्व हालचाली बंद होतात. लाळ व घाम अति प्रमाणात गळतात. व श्वासाचा रोध–श्वासाला त्रास होतो. **धामणीच्या ( घोणसाच्या ) सात लहरी व लक्षणे**— १ प्रथम रक्त दुष्ट होते, पिवळे होते. सर्वांग

दाह, अवयव पिवळे होतात. २ मांस दुष्ट होते. अतिशय पिवळेपणा व दाह. दंशात सूज येते ३ मेददुष्टि. डोळा धरणे, तहान, घाम व दंशातून स्राव व घाम येतो. ४ कोठ्यात प्रवेश करून ज्वर येतो. ५ सर्वांग दाह. ६ व ७ पूर्वी प्रमाणे. **राजीमंताच्या सात लहरी व लक्षणे**— १ विष रक्त दुष्ट करते. पांडुता, रोमांच, पांढरटपणा येतो. २ मांस दूषित करते. पांढरटपणा, फार जडपणा, डोक्याला सूज येते. ३ मेद बिघडविते. डोळे जखडणे; दंशातून, नाकडोळे यातून स्राव व घाम येतो. ४ कोठ्यात प्रवेश करून मान जणडणे, डोके जड होते. ५ वाचा अडखळते. थंडी वाजून ताप येतो ६ व ७ पूर्वीप्रमाणे. सर्पविष क्रमाने एकेक. कला ओलांडून एकेक वेग करतात. **सर्पविषाचे पशु-पक्षि वेग**- ( लहरी ) – पशूना चार व पक्ष्यांना तीन वेग येतात. मांजर, मुंगुस इत्यादींना सर्पाचे विष फार बाधत नाही. **सर्पविषाचे उपचार**–शाखांमधील दंशाचे वर चार अंगुळावर अरिष्ट बांधावे. अरिष्ट म्हणजे कपडा, दोरी, चामडे, झाडाची अंतर्साल यांपैकी कशाचा तरी बंध मंत्र म्हणून बांधणे. अरिष्टाने अडविलेले विष शरिरात पसरत नाही. जेथे बंध बांधता येत नाही तेथे दंश उकरून जाळावा, दंशातील रक्त चोखावे, तुंबडीने ओढावे, जखम अधिक तोडून रक्तस्राव करावा. ( रक्तस्रावाने विष बाहेर काढले जाते. ) व डाग द्यावा. हे उपचार सर्वत्र करावे. पण घणसाचा ( मंडलीसर्प ) दंश जाळू नये. कारण विषाच्या पित्ताधिक्याने दंश आजूबाजूला पसरतो. मंत्राचा उपयोग न झाला तर दंशावर छेद घेऊन अगद विषनाशक औषधे द्यावीत. दंशावर अगदलेप लावावे. चंदन, काळा वाळा यांच्या पाण्याने सिंचन करावे. **वर्ज्य**–तेल, कुळीथ, मध, कांजी, ( प्रकार ) पिऊ नये. परंतु दुसरा वामक द्रव थोडा थोडा देऊन वांती करवावी. वांतीने विष सुखाने बाहेर काढले जाते. **वेगानुरूप उपचार**- नाग- पहिली लहर-रक्त काढावे. दुसरीत मध तुपात विषनाशक औषध ( अगद ) पाजावे. तिसरीत विषनाशक औषध नाकात व डोळ्यात घालावे. चवथीत वांतीचे औषध देणे व वांती झाल्यावर पेज यवागू द्यावी. पाचवी व सहावीत थंड उपचार करून तीव्ररेचक द्यावे; व नंतर पेज यवागू पाजावी. सातवीत तीक्ष्ण औषध नाकात व डोळ्यात घालावे व डोक्यावर शस्त्राने काकपद करून मांस ( चमड्यासह ) ठेवावे. **घणस**—पहिलीत व दुसरीत वरचेच उपचार. तिसरीत तीव्र विरेचन व नंतर पेज यवागू द्यावी. चवथी–पाचवीत नागाच्या त्या त्या वेगांप्रमाणेच. सहावीत गोड अगद द्यावे. सातवीत तेच करावे. राजीमंत– १ तुंबडीने रक्त काढून मधतुपात अगद पाजावा. दुसरीत ओकारीकरिता विषाचा नाश करणारे अगद द्यावे. ३ ते ५ वी लहर—नागाच्या त्या त्या लहरी प्रमाणे. सहावीत तीक्ष्ण अंजन. सातवीत अवपीडक घृत–तूप पाजून यवागू नंतर पुन्हा तूप पाजावे. गर्भिणी, बालक व वृद्ध यांना रक्तस्राव न करता बाकीचे ते ते सौम्य उपचार करावे. शेळी, मेंढी याना रक्तस्राव, अंजन माणसासारखे; गाय, घोडा याना दुप्पट; म्हैस, उंट यांना तिप्पट व हत्तीला चौपट प्रमाणात रक्तस्राव इत्यादी उपचार करावे. सर्व पक्ष्यांना श्रेष्ठ विषहर द्रव्यांनी लेप व परिषेक करावेत.

**( सर्पा )**–स्त्री., **भैषज्य० द्रोणीप्रावेशिकरसायनेष्वेका, सर्पाकारा ओषधि०** ( चचि. १(४).७ )
सर्पाकार औषधी. द्रोणी ( डोणी ) चा प्रयोग करावयाच्या रसायन औषधींमध्ये एक.

**–कण्टक**–पु., **सर्पदन्तः** ( सुक. ३.५ ) सापाचा दात.

**–काय**–वि,, **राजसकाय० यस्तीक्ष्णः आयासी भीरुश्चण्डो मायान्वितो विहारचपल आहारचपल इत्येवमादिलक्षणः सर्पकायो नरः विज्ञेयः** ( सुशा. ४.८९-९० )
सर्पप्रकृतीचा. राजसप्रकृतीचा एक प्रकार. तीक्ष्ण, श्रमी, भित्रा भयंकर कपटी, चलाख, चपळ हालचालीचा व आहार चपळतेने घेणारा. घाईने खाणारा.

**–गन्धा**–स्त्री., **वनस्पति० नाकुली** ( ड. सुक. ५,८४-८६; ध. ४.१९३ ) मुंगुसवेल. **वर्षासु छत्राकारा** ( सुउ. ६०.४७ ) **सर्पछत्रिका** ( ड. सुक. ७.२८-३१ )
सर्पाकार छत्री. (पावसाळ्यात होणाऱ्या )

**–ग्रन्थि**–वि., **वनस्पति०पिप्पलीमूलम्** (रा. ६.११३) पिंपळमूळ.

**–घाति**–न., **फलविष०** ( सुक. २.५ ) **द्र० ' विष '**
एक फळ.

**–च्छत्रक**–न., **सर्पफणाकारं छत्रकम्, इदं शाकवर्गे नान्तर्भूतम्, अतः तद्गुणादिकं नोक्तम्** ( चसू. २७.१२३ )
सर्पाच्या फणी सारखी छत्री. ही भाजीच्या वर्गात नाही म्हणून गुणकर्म सांगितले नाहीत.

**–तनु**–स्त्री., **वनस्पति० बृहती** ( रा. ४.१२३ )
डोरली.

**–दंश**–पु., **सर्पस्य दंशः, प्रकाराः– गूढसंपादितवृत्त-पीडितलम्बितार्पितसर्पितभृशाबाधेत्यादयः सामान्यतो दंशप्रकाराः** ( चचि. २३.१२५, असंउ. ४१ ) **द्र० ' सर्प '**
सर्पाचा दंश. प्रकार–खोल, वाटोळा, अतिशय वेदनावान, पूर्ण दात आत जाऊन झालेला, व अतिशय-दंशामुळे बाधा झालेला. असे दंशाचे प्रकार आहेत. पहा ' सर्प. '

**–दंशन**–न., **सर्पदंशः** ( चचि. २३.५० ) **द्र० 'सर्प'**
सर्पाचा दंश.

**–दंष्ट्रा**–स्त्री., **विषयुक्तः सर्पदन्तस्तस्य चत्वारो भेदाः; वामाऽधरा वामोत्तरा दक्षिणाऽधरा दक्षिणोत्तरा च** ( चचि. २३.१३७ ) **द्र० ' सर्प '**
विषयुक्त सापाची दाढ. चार प्रकार. खालची डावी, वरची डावी, खालची उजवी, वरची उजवी.
**वनस्पति० मेषशृङ्गी** ( ध. १.८७ ) मेढशिंगी.

**–दण्डा**–स्त्री., **वनस्पति० सैंहली पिप्पली** ( रा. ६.११९ ) सिंहली पिंपळी.

**–दण्डी**–स्त्री., **वनस्पति० गोरक्षी** ( रा परि. ५.३० )
गोरखी.

**–दन्ती**–स्त्री., **वनस्पति० नागदन्ती** ( रा परि. ५.२७ )
नागदंती.

**–दमनी**–स्त्री., **वनस्पति० वन्ध्यकर्कोटकी** ( ध. १.१८५ ) वांझ कटोली.

**–दष्ट**–वि., **सर्पेण दष्टः** ( चसू. १३.३२; सुक. ५.१ )
सापाने चावलेला.

**–दष्टविषचिकित्सित**–न., **अध्यायसंज्ञा०** ( सुक. ५.१ )
अध्यायाचे नाव. यात सापाने चावलेल्या विषाचे उपचार दिले आहेत.

**–दष्टविषविज्ञानीय**–वि., **अध्यायसंज्ञा०** ( सुक. ४.१ )
अध्यायाचे नाव. सर्पाच्या विषाचे ज्ञान यात आहे.

**–निर्मोक**–पु., **सर्पत्वक्, योनिधूपनद्रव्येष्वेकम्** ( चशा. ८.४१; सुशा. १०.११; र. २१.६०-६२ )
सापाची कात. योनीला धूप–धुरी देण्याचे एक द्रव्य.

**–फण**–न., **शलाकायन्त्र० सर्पमुखम्** ( सुसू. ७.१४ ) **अश्मर्याकर्षणे उपयुक्तम्** ( अहसू. २५.३२ )
सापाच्या फणेच्या आकाराचे तोंड असलेले यंत्र. शल्य वर करून काढण्यास उपयुक्त. मूतखडा काढण्यास उपयुक्त.

(**–फणा** )–स्त्री., **सर्पफणम्** ( अहसू. २५.३३ )
सापाची फणा.

**–मणि**–पु., **रत्न० सर्पविषशमनार्थं धारणीयो मणिः** ( चचि. २३.२५२-५३ )
एक रत्न. सर्पाचे विष बाधू नये ते नाहीसे व्हावे म्हणून धारण करण्यास योग्य.

**–मांस**–न., **सर्पस्य मांसम्** ( असंसू. ७.२५९ )
सापाचे मांस.

**–वसा**–स्त्री., **सर्पस्य वसा, सेयं नेत्ररोगेषु अञ्जनार्थमुपयुज्यते** ( असंउ. १९ )
नागाची चरबी. नेत्ररोगात डोळ्यात अंजन करण्यास उपयुक्त.

**–वेताली**–स्त्री., **मञ्जर्याख्या महावेताली च** ( इन्दुः असंउ. ४२ ) मञ्जर्या. महावेताली.

**–सत्त्व**–वि., **राजससत्त्वभेदः, सर्पस्वभावः ( कायः )** ( सुशा. ४.८९-९० ) **द्र० ' सर्पकाय '**
सर्पप्रकृतीचा. राजसप्रकृतीचा प्रकार. सर्पाच्या स्वभावाचा.

**–सुगन्धा**–स्त्री., **वनस्पति० नाकुली** ( इन्दुः असंउ. ६; ध. ४.१०३ ) मुंगुसवेल.

**–स्त्री**–स्त्री., **सर्पिणी** ( असंउ. ४१ ) **द्र० ' सर्प '**
सर्पिणी.

**सर्पाक्षी**–स्त्री., **वनस्पति० रक्तपुष्पा** ( सुक. ४.१४-२७ )
तांबड्या फुलांची सर्पाक्षी. मुंगुसवेल.
**वनस्पति० गन्धनाकुली** ( र. ११.३७-३९; ध. ४.१०६ ) मुंगुसवेल.
**महासुगन्धा** ( ध. ४.१०५ ) मुंगुसवेल.
**विष्णुक्रान्ता** ( ध. ४.११५ ) विष्णुक्रांता.
**गण्डाली** ( र. ११.५२-५७; असंउ. ४४ )
पांढरी दूर्वा.

**सर्पाख्य**–पु., **वनस्पति० शुभ्रालुः** ( रापरि. ७.३३ )
पांढरा आलू.

**सर्पाङ्गाभिहत**–न., सर्पशरीरेण ताडितं स्पृष्टं वा (शङ्काविषम्) (सुक. ४.१९)
सर्प शरिराचा स्पर्श झालेला. सर्पाने शेपूट मारलेला.

**सर्पाङ्गी**–स्त्री., वनस्पति० सैंहली पिप्पली (रा. ६.११९)
सिंहली पिंपळी.

**सर्पादनी**–स्त्री., वनस्पति० नाकुली (७.१५३)
मुंगुसवेल.

**सर्पावास**–न., वनस्पति० चन्दनम् (रा. १२.२)
चंदन.

**सर्पास्य**–न., सर्पवक्त्रं नाम शस्त्रं नामाऽनुगताऽऽकारं घ्राणार्शश्छेदने कर्णार्शश्छेदने च योज्यम् (अहसू. २६.८)
सापाच्या तोंडासारखे शस्त्र. कान व नाक यातला मोड कापण्यास उपयोगी.

**सर्पिणी**–स्त्री., वनस्पति० भुजगी (रापरि. ५.३९)
एक वनस्पती.

**सर्पित**–न., सर्पदंश० सर्पो यत्र दन्तानामेकं द्वे बहूनि वा पदानि निमग्नान्यल्परक्तानि यान्युध्दृत्य करोति, तथा च तानि चञ्चुमालकयुक्तानि वैकल्यकरणानि संक्षिप्तानि सशोफानि क्षतानि भवन्ति तत् सर्पितमिति विद्यात् (सुक. ४.१४-१६) द्र०' सर्प'
सर्पाचा अति खोल दंश. दाताच्या दंशाच्या एक वा अनेक खुणा अति खोल, थोडे रक्त दिसणाऱ्या असतात. त्या सूक्ष्म सूज व वडाच्या पारंब्याच्या टोकांच्या सारख्या उंचवट्याच्या रांगेने युक्त व विकार करणाऱ्या असतात. त्या दंशाला सर्पित म्हणतात.

**सर्पिस्**–न., घृतम् (र. २०.१९-२२) तूप.

**(सर्पिर्)-गुड**–पु., योग० धात्रीविदारीजीवनीयादियुक्तः, गुडः स्त्यानसर्पिर्युक्तः भेषजद्रव्ययुक्तश्च यक्ष्मापस्मारमेहघ्नोऽयम् (चचि. ११.५०-५५)
एक योग. आवळकठी, भुईकोहाळा, जीवनीय औषधींनी युक्त. गूळ, घट्ट तूप युक्त. क्षय, अपस्मार मेहनाशक.

योग० पुनर्नवा बलाविदार्यादियुक्तः, शोषे कासे क्षतक्षीणे रक्तनिष्ठीवनादौ च हितम् (चचि. ११.५६-६१)
पुनर्नवा, बला, भुईकोहळा इत्यादी युक्त. क्षय, खोकला, उरःक्षताने क्षीण, रक्ताचे बेडके पडणे इत्यादींवर उपयुक्त.

**–द्रोणी**–स्त्री., उपक्रम० बद्धगुदे परिस्राविणि च उदररोगे शल्यकर्मानन्तरं व्रणितवेनाऽऽध्मानक्लेशनिवृत्यर्थमुपयुज्यते (सुचि. १४.१७)
तूप घातलेली डोणी. बद्धगुद व परिस्रावी उदरात शस्त्रकर्म झाल्यानंतर उपयोगी.

**–मण्ड**–पु., विलीनघृतस्य घनीभूत उपरितनो भागो मण्डः (सुसू. ४५.१०६)
तुपाचा मंड. पातळ तुपाच्या वरचा घन असलेला साईसारखा भाग.

**–मेह**–पु., रोग० वातजप्रमेहभेदः द्र० ' प्रमेह ' (सुनि. ६.१२)
वातज प्रमेहाचा प्रकार.

**(सर्पिष्)–पान**–न., उपक्रम० वातपित्तोत्तरे ज्वरे मन्दकफे, परिपक्वेषु दोषेषु ज्वरशान्त्यर्थं घृतपानं प्रशस्यते (चचि. ३.१६४-६५; असंसू. १३.४)
तूप पिणे. उपचार. वातपित्ताधिक तापात कफ कमी असताना दोष पक्व झाल्यावर ज्वर शांत होण्याकरिता तूप पिणे हे प्रशस्त आहे.

**–मती**–वि., घृतयुक्ता (यवागूः) (चसू. २.२६)
तूपयुक्त. (अशी पेज, यवागू.)

**सर्व**–वि., अखिलम् (सुउ. ३९.७) सगळे, पुरे, परिपूर्ण.

**–कायचिकित्सा**–स्त्री., सर्वस्मिन् देहे करणीया चिकित्सा अखिलदेहचिकित्सितम् (सुउ. ३९.७)
सर्व शरिरावर करावयाचे उपाय.

**–कुष्ठान्तकृत्तैल**–न., तैल० कृष्णाऽभ्रकं गन्धकं नीलज्योतीरसं पारदं कङ्गुणीनिम्बकार्पासबीजानां च तैलमित्येतत्सर्वमयःखल्वे मर्दयेत्। बहिरन्तश्चोपयोजयेत्। फलं–सर्वकुष्ठविनाशः (र. २०.४७-४८)
एक औषधी तेल. काळे अभ्रक, गंधक नीलज्योतीचा रस, पारा, मालकांगोणी, निंब व कपाशी यांच्या बियांचे तेल ही सर्व लोखंडाच्या खलात खलावी. हें अंतर्बाह्य उपयोगात आणावे. हे सर्वकुष्ठनाशक आहे.

**–कोप**–पु., सर्वदोषाणां वृद्धिः (अहसू. १३.१५)
सर्वदोषांची वृद्धि–वाढ.

**–क्षम**–वि., सर्वरसाभ्यासक्षमः, च (चसि. १२.९)
सर्व रस सहन करण्याचे सामर्थ्य. सर्व रस सेवन करण्याची पात्रता.

**–क्षार**–पु., लवण० (रा. ६.५७)
मिठाचा एक प्रकार.

**–क्षीरी**–स्त्री., वनस्पति० क्षीरिणी (ध. १.२४२)
सुवर्णक्षीरी, पिवळा धोतरा, पिसोळा.

**–गत**–वि., सर्वव्यापी, विभुः साङ्ख्ये चरके चाऽऽत्मा विभुर्नित्यश्च । सुश्रुतमते पुरुष असर्वगतो नित्यश्च ( सुशा. १.१६ )
सर्वत्र जाणारा, असणारा, आत्मा, सर्वव्यापी. सांख्यमताने व चरकमताने आत्मा सर्वव्यापी व नित्य. सुश्रुतमताने पुरुष सर्वगत नसणारा पण नित्य आहे.

**–गतत्व**–न., सर्वशरीरावयवगतत्वम् ( चवि. ५.४ )
सर्व शरिरावयवातील सर्व सूक्ष्म घटकात असणे, व्यापणे.

**–गतरोगविज्ञानीय**–वि., अध्यायसंज्ञा० (सुउ. ६ )
अध्यायाचे नाव. सर्व डोळा व्यापणारे रोग. यात सांगितले आहेत.

**–गन्ध**–पु., गन्धयुक्तानि सर्वद्रव्याणि, एलाऽगरुचन्दनकस्तूरीकर्पूरतुरुष्कादीनि ( चचि. २८.१७४-१५०-५४ )
सर्व गंधयुक्त द्रव्यांचा वर्ग. वेलदोडा, अगरु, चंदन, कस्तुरी, कापूर, सरळदेवदाराचा डिंक इत्यादी द्रव्ये.

**–गन्धवर्ग**–पु., एलादिपठितानां गन्धद्रव्याणां समूहः ( असंसू. ८.७२ )
वास असणाऱ्या वेलदोडा इत्यादी सर्व द्रव्यांचा समुदाय.

**–गन्धादि**–पु., एलादयः, कटुकफलादय इत्यन्ये ( सुचि. ३.५९; सुसू. ३८.२४ ) द्र० 'एलादि'
सर्व गंधद्रव्ये. एलादिगण, किंवा पटोलादिगण.

**–गन्धाम्बु**–न., सर्वसुगन्धिद्रव्ययुक्तमुदकम् ( असंसू. ८.९४ )
सर्व सुगंधि द्रव्यांनी युक्त पाणी.

**–गन्धोदक**–न., सर्वसुगन्धिद्रव्ययुक्तं जलम् ( असंसू. १ )
सर्व सुगंधि द्रव्यांनी युक्त पाणी.

**–गुणसमुदित**–वि., सर्वप्रकृतिषूक्तप्रशस्तगुणयुक्तः ( चवि. ८.१०० )
सर्व प्रकृतीचे गुण सांगताना सांगितलेल्या सर्व गुणांनी युक्त.

**–ग्रन्थिक**–न., वनस्पति० पिप्पलीमूलम् (ध.२.७५)
पिंपळमूळ.

**–ग्रह**–पु., सस्याऽऽहारस्य प्रमाणग्रहणम्, एकपिण्डेन सर्वग्रहः ( चवि. १.२२(४)
आहारात घ्यावयाच्या प्रत्येक पदार्थाचे व त्या सर्वांचे मिळून होणारे प्रमाण ठरविणे.



**–चक्षुस्**–न., सर्वं च तत् चक्षुश्च सर्वप्रमाणम् ( चवि. ३.३६ )
सर्वसामान्यदृष्टि.

**–ज**–पु., व्याधिभेदः, त्रिदोषजः सान्निपातिको वा ( र. २९.१३८-४० )
सर्वदोषज. तिन्ही दोषापासून झालेला, सन्निपातात्मक.

**–जनप्रिया**–स्त्री., वनस्पति० ऋद्धिः ( ध. १.१४५ )
एक अष्टवर्गातील वनस्पती.

**–ज्वरान्तक**–पु., योग० हरितालं ताम्रभस्म लोहभस्म पिप्पलीतुत्थमभ्रकभस्म कान्तलोहभस्म नागभस्म पुनर्नवाचूर्णं चेत्येतेषां समभागिकानां भृङ्गराजकासमर्दपुनर्नवामहार्कपत्ररसैरवघर्षणाद्वालुकायन्त्रे च परिपचनाज्जायमानो योगः सर्वज्वराणां च विनाशनः ( र. १२.४८ )
एक औषधियोग. हरताळ इत्यादी समभाग द्रव्ये माका इत्यादींच्या रसात खलून वालुका यंत्रात पचवून तयार केलेला योग. सर्व ज्वरनाशक.

**–तन्त्रसामान्य**–न., सौश्रुते शल्यतन्त्रेऽपि सर्वेषां व्याधीनां यथास्थूलमवरोधः कृतः, यथा शालाक्यादीनां सामान्यात् तुल्यत्वात् ( सुसू. २४.४ )
समानतंत्रत्व. सुश्रुताच्या शल्यतंत्रात सुद्धा सर्व रोगांचा स्थूलमानाने सर्व रोगांचा समावेश केला आहे. जसे–शल्यतंत्रात शालाक्याचा समावेश.

**–तन्त्रसिद्धान्त**–पु., सर्वतन्त्रसिद्धान्तो नाम तस्मिंस्तस्मिन् सर्वस्मिंस्तन्त्रे तत्तत् प्रसिद्धं; यथा सन्ति निदानानि, सन्ति व्याधयः, सन्ति सिध्युपायाः साध्यानामिति ( चवि. ८.३७ )
सर्व तंत्रात समान असणारे सिद्धांत. त्या त्या तंत्रात ते ते प्रसिद्ध असते. जसे–रोगांची कारणे रोग आणि साध्य रोगांवरील उपचार हे सर्व प्रत्येक तंत्रात असते.

**–तिक्ता**–स्त्री., वनस्पति० काकमाची ( रा. ४.३५ )
कावळी.

**–दोषसमीरण**–वि., सर्वदोषकोपनः, सर्वदोषप्रकोपकः ( चसू. २७.२१३ ) सर्व दोषाचा प्रकोपक.

**–धान्यकृतयूष**–पु., यूष० अयूषयोनित्वाच्छूकधान्यकुधान्ये विहाय मुद्गादिशमीधान्यानामपथ्यवर्ज्यं यूषः । अयं तन्त्रान्तरे नवमुष्टिनाम्नाऽभिहितः ( सुसू. ४६.३७५ )
सर्व धान्याचा यूष-कढण. कुसळे असलेली तांदूळ गहू इत्यादी तसेच वन्याचे तांदुळ इत्यादी कुधान्ये

यांचा यूष होऊ शकत नाही म्हणून ती सोडून मूग इत्यादी शेंगांच्या धान्यांपैकी अपथ्याचे सोडून सर्वांचे केलेले कढण. याला दुसरीकडे नवमुष्टियूष म्हणतात.

**–पच**–वि., **सर्वं पचतीति** ( चसि. १.१२-१३; अहसू. १८.३०; असंसू. २७.२४ ) काहीही-सर्व पचवणारा.

**–पावक**–पु., **सर्वे च ते पावकाश्च सर्वपावकाः। जाठराग्निभूताग्निधात्वग्नयः** ( अहसू. ४.३० )
सर्व अग्नि. पंचमहाभूताग्नि, सात धात्वग्नि व जाठराग्नि असे सर्व तेरा अग्नि. जाठराग्नि व दोष धातु मल, महाभूत इत्यादींचे अग्नि.

**–पुष्पी**–स्त्री., **वनस्पति० नागदन्ती** ( रापरि. ५.२७ )
पांढऱ्या व गोड फुलांची एक वनस्पती. सूर्यकमळ.

**–बुद्ध्यङ्गहीन**–वि., **ऊहाऽपोहविचारस्मृत्यादिभिः हीनम्** ( चशा. ४.३९(३)
बुद्धीची सर्व अंगे नसलेला. ऊहापोह, विचारशक्ति, स्मरणशक्ति इत्यादी कमी असलेला.

**–भूतचिन्ताशारीर**–न., **अध्यायसंज्ञा० सुश्रुतशारीरतन्त्रे प्रथमोऽध्यायः, सर्वभूतानि स्थावरजङ्गमानि महाभूतानि पृथिव्यादीनि वा, तेषां चिन्ता। हेतुस्वलक्षणकार्यैश्चिन्तनमस्मिन् अध्यायेऽस्तीति** ( सुशा. १.१ )
अध्यायाचे नाव. सर्व महाभूते, भूते व स्थावर, जंगम व प्रकृति पुरुष यांचा विचार यात केलेला आहे.

**–भूतप्रमर्दिनी**–स्त्री., **वनस्पति० वन्ध्यकर्कोटकी** ( ध. १.१८६ ) वांझ कर्टोली.

**–मार्गानुसारिणी**–वि., **सर्वमार्गाः कोष्ठसंधिमर्मशाखास्ता ( मात्रा ) अनुसर्तुं शीलमस्येति** ( चसू. १३.३४ )
शरिरातील कोष्ठ, मध्यम मार्ग व शाखा अशा सर्व मार्गात पसरणारी ( मात्रा ).

**–रसप्रत्यनीक**–वि., **मधुरादिपञ्चरसानां प्रत्यनीको विपक्षउच्छेदक इत्यर्थः। यथा–सर्वरसविरुद्धो लवणो रसः** ( सुसू. ४२.९(३)
सर्व रसांचा विरोधी. गोड आंबट इत्यादी पाच रसांचा प्रतिस्पर्धी. जसे–खारट रस.

**–रससात्म्य**–वि., **षण्णां रसानां सात्म्यं यस्य, सः** ( चवि. ८.११८ )
सर्व सहाही रस ज्याला आत्मसात झालेले आहेत असा.

**–रसाभ्यास**–पु., **षड्रसानां सेवनम्, तत् बलकराणां श्रेष्ठम्** ( चसू. २५.४०; असंसू. १३.३ )
सर्व सहा रसांचे नित्य सेवन. बलवर्धक उपायात श्रेष्ठ आहे.

**–रोगाग्रज**–वि., **सर्वशारीररोगाणां श्रेष्ठः ( ज्वरः )** ( चचि. ३.४ )
सर्व शारीर रोगात श्रेष्ठ. (ज्वर).

**–रोगाधिपति**–पु., **सर्वरोगाणामधिपतिः ( ज्वरः )** ( चनि. १.३५ )
सर्वरोगांचा अधिपति–मुख्य. (ज्वर).

**–लवण**–न., **भैषज्य० लवणम्** ( रा. ६.५१ )
औषर नावाचे मीठ.

**–लोक**–पु., **सर्वप्राणिनः उद्भिज्जाश्च, षड्धातुसमुदायो हि सामान्यतः सर्वलोकः** ( चशा. ५.७ )
सर्व प्राणी व वनस्पती सृष्टी, आत्मा व पंचमहाभूते अशा ६ धातूंचा समुदायरूप पुरुष.

**–लोकाश्रय**–पु., **योग० पारदगन्धकौ पले पलार्धं माक्षिकहरिताले, वत्सनाभरसके, प्रत्येकं कर्षं सर्वं संमर्द्य कूप्यां पाचयेत्। कफवातजरोगानर्शांसि शोफं पाण्डुं राजयक्ष्माणं शूलं ज्वरं च नाशयति। जठराग्निं च दीपयति** ( र. १५.१७-२४ )
एक औषधियोग. पारा, गंधक चार चार तोळे; माक्षिक, हरताळ दोन दोन तोळे; बचनाग, कलखापरी तोळा तोळा सर्व एका कुपीत पक्व करावे. हा योग वात, कफरोग, मूळव्याध, सूज, पांडु, क्षय शूल व ज्वरनाशक व जठराग्नि प्रदीप्त करतो.

**–वातारि**–पु., **पारदयोग० हरितालमनःशिलामाक्षिकादियुक्तः, अशीतिवातव्याधिनाशनः, गुल्माग्निमांद्यकृमिहिक्कादिनाशनः** ( र. २१.११७-२२ )
पाऱ्याचा एक योग. हरताळ मनशील माक्षिक इत्यादी युक्त. ऐशी वातव्याधि नाशक. गुल्म, अग्निमांद्य, कृमि उचकी इत्यादी नाशक.

**–विमुक्तसंधि**–वि., **यस्य सर्वेऽपि संधयः प्रशिथिलीभूताः, एतादृशो नरः प्रशिथिलाखिलसन्धिः** ( सुउ. ५६.११ )
ज्याचे सर्व संधि अतिशय शिथिल झाले आहेत असा.

**–वृत्ता**–वि., **पाशरहिता ( सूची )** ( अहसू. २६.२२ )
गोल मुठीच्या बैठकीवर गोल बसवलेल्या सुया.

**–श्वेता**–स्त्री., **कीट० गलगोलिकाभेदः** (सुक.८.२९)
एक किडा. गलगोलिका.

**-संन्यास**-पु., सर्वक्रियात्यागः ( चक्र. ) स हि परमसुखमोक्षहेतुः ( चक्र. ) सुखानां श्रेष्ठः ( चसू. २५.४० )

सर्वत्याग, सर्व कर्मत्याग ( सर्व सुखात श्रेष्ठ. ) परम श्रेष्ठ सुख जो मोक्ष त्याचे कारण.

**-सर**-पु., मुखरोग० मुखदन्तौष्ठादि सप्तस्थानानां व्यापकतया सर्वसरत्वं ज्ञेयम् ( मधुकोश. ) वातपित्तकफशोणितभिन्नाश्चत्वारः सर्वसराः यस्य वदनं सतोदैः स्फोटैः समन्तादाचितं, स वातजः सर्वसरः । यस्य तु सदाहैस्तनुभिः सपीतै रक्तैः स्फोटैः वदनमाचितं, स पित्तजः सर्वसरः । यत्र यस्य च वदनमल्परुजैः कण्डूयुतैः सवर्णैः स्फोटैराचितं, स कफजः सर्वसरः । रक्तजः सर्वसरो मुखपाकसंज्ञः, स पित्तोदित एक एव ( सुनि. १६.६५-६६ ) सर्वं सरतीति सर्वसरः ( सुचि. २३.३ )

तोंडाचा एक रोग. तोंड, दात, ओठ इत्यादी सातही स्थानांना व्यापक असलेला म्हणून सर्वसर. प्रकार चार— वात, पित्त, कफ व रक्तज. **वातज**— टोचणी असलेल्या फोडांनी भरलेले तोंड असते. **पित्तज**— दाहयुक्त बारीक, पिवळ्या, लाल फोडांनी तोंड युक्त असते. **कफज**— त्वचेच्या रंगासारखेच खाजऱ्या व थोडी वेदना असलेल्या फोडांनी युक्त. **रक्तज**— यालाच तोंड येणे–मुखपाक म्हणतात. हा पित्तजाप्रमाणेच असतो. सर्वत्र पसरतो म्हणून सर्वसर.

**-सरत्व**-न., सर्वाङ्गव्यापित्वम् ( चचि. २९.१३ )

सर्वांग व्यापित्व. सर्व शरिरभर पसरणे–पसरण्याचा गुण.

**-सह**-वि., सर्वरसाभ्यासक्षमः सर्वचेष्टाक्षमः च ( चसि. १२.९; टिप्पणी–पाठान्तरम् )

सर्व रसांचा आहार सेवन करणे ज्याला मानवू शकते तो. सर्व प्रकारच्या हालचाली सहन करणारा. सर्व सहन करण्याचे सामर्थ्य असलेला. सर्व कष्ट सहन करणारा.

**-हित**-न., वनस्पति० मरिचम् ( रा. ६.१३६ ) मिरें.

**सर्वतोभद्र**-पु., छेदविशेषः, सर्वतश्छेदः ( असंसू. ३३ )

शस्त्राने करावयाचा एक छेद. सर्व बाजूनी घेतलेल छेद.

वनस्पति० निम्बः ( ध. १.२९ ) निंब.

**( सर्वतोभद्रा )**-स्त्री., वनस्पति० काश्मरी ( ध. १.११७ ) शिवण.

**सर्वतोभद्रक**-पु., छेदविशेषः, अयं भगन्दरशस्त्रकर्मणि क्रियते ( सुचि. ८.१० )

शस्त्राने करावयाचा एक छेद. हा भगंदरात घ्यावा लागतो.

**( सर्वतोभद्रिका )**-स्त्री., वनस्पति० काश्मरी ( ध. १.११७ ) शिवण.

**सर्वतोमुख**-न., जलम् ( रा. १४.३१८ ) जल, पाणी.

**सर्वाक्षिगतरोग**-पु., नेत्ररोग० एते सप्तदश–चत्वारः स्यन्दाः ( अभिष्यन्दाः ), चत्वारश्चाधिमन्थाः, द्वौ पाकौ, हताधिमन्थोऽनिलपर्ययः शुष्काक्षिपाकोऽन्यतो वातोऽम्लाध्युषिता दृष्टिः सिराणामुत्पातः, सिराणां हर्ष इति ( सुउ. ६.३-४ )

नेत्ररोग. हे सत्रा आहेत. स्यंद ४. त्यांना अभिष्यंद म्हणतात. ४ अधिमंथ. २ नेत्रपाक, हताधिमंथ, अनिलपर्यय, शुष्काक्षिपाक, अन्यतोवात, अम्लाध्युषितदृष्टि, सिरोत्पात आणि सिराहर्ष.

**सर्वागार**-न., सर्वसंपन्नं गृहम् ( सुशा. १०.५ )

आवश्यक ते सर्व ज्या घरात आहे ते घर. भरलेले घर.

**सर्वाङ्गग्रहण**-न., लक्षण० वेदनया सर्वेषामङ्गानां बद्धत्ववद् अनुभवः ( सुउ. ३९.१३-१४ )

सर्व अंग जखडल्यासारखे वाटणे, सर्व शरीर बांधल्याप्रमाणे वेदना होणे.

**सर्वाङ्गरोग**-पु., रोग० अशीतिवातविकारेष्वेकः, सर्वं देहं संकोचयति वातः, तोदशूले च करोति ( चसू. २०.११ ) पक्षवधस्येव संप्राप्त्यादि ज्ञेयम्। सर्वकायाश्रितो वायुः सिराः स्नायूः विशोष्य संधिबन्धान् विमोक्षयन् संपूर्णमङ्गं विचेतनमकर्मण्यं च करोति ( असंनि. १५.४३ )

ऐशी वातरोगांपैकी एक. सर्व शरीर आखडते. टोचणी, व शूल होतो. अर्धांग वाताप्रमाणेच संप्राप्ति इत्यादी समजावी. सर्व कार्य करणारा वायु शिरा व स्नायु शोषून संधींची बंधने ढिली करून सर्व शरिराचा स्पर्श व कर्मे नाहीशी करतो.

**सर्वाङ्गशोफ**-पु., लक्षण० सर्वाङ्गव्यापकः शोफः ( असंसू. ३६.८ )

सर्व शरिराला आलेली सूज.

**सर्वाङ्गसारिन्**-वि., सर्वाङ्गप्रसारी ( शोफः ) ( सुनि. १०.३ )

सर्व अंगात पसरणारी सूज.

**सर्वाङ्गसुन्दर**–पु., पारदयोग० अभ्रकगन्धकत्र्यूषणहिङ्गुगुग्गुलादियुक्तः, अयं गुल्मशूलसन्निपातज्वरप्लीहाग्रहणीरोगनाशनः ( र. १८.७८-८२ )
पाऱ्याचा योग. अभ्रक, गंधक, सुंठ, मिरे, पिंपळी, हिंग, गुग्गुळ इत्यादींनी युक्त. हा गुल्म शूल, त्रिदोषज ज्वर, प्लीहा, ग्रहणी हे रोग नाहीसे करतो.

**( सर्वाङ्गसुन्दरा )**–स्त्री., वाग्भटकृताऽष्टाङ्गहृदयस्याऽरुणदत्तनाम्ना टीकारेण विरचिता टीका सर्वाङ्गसुन्दरा इति ख्याता ( अरु. अहृसू. १.१ )
वाग्भटाने केलेल्या अष्टाङ्गहृदयावरची अरुणदत्त या टीकाकाराने रचलेली टीका.

**सर्वात्मन्**–वि., सर्वहेतुः सर्वकारणस्वरूपः ( वायुः ) ( सुनि. १.६ )
सर्वांचे कारण असलेला. सर्वांचे कारण स्वरूपी. ( वात ).

**सर्वानुकारिणी**–स्त्री., वनस्पति० पृश्निपर्णी ( ध. ९.९१ ) पिठवण.
शालिपर्णी ( रा. ४,११४ ) सालवण.

**सर्वानुभूति**–स्त्री., वनस्पति० शुक्रभाण्डी (ध.१.२४५)
काळ्या तेडाचा एक प्रकार.
त्रिवृत् ( चक. ७.४ ) तेड.

**सर्वाभाव**–पु., धर्मादिचतुर्वर्गाभावः ( चनि. ६.७ )
सर्वांचा अभाव. धर्म अर्थ, काम, मोक्ष या चारांचा म्हणजे सर्व वर्गांचा अभाव.

**सर्वामयघ्न**–पु., योग० तुत्थहरिद्राकन्दगन्धकादियुक्तः, अयं सर्वरोगहरः ( र. १८.२१-३० )
मोरचूद, हळद गंधक इत्यादीयुक्त एक योग. हा सर्व रोगहारक आहे.

**सर्वार्थसिद्धाख्य**–न., अञ्जनम् ( असंसू. ८.९१ )
सर्वार्थसिद्ध नावाचे एक अंजन.

**सर्वारोग्यवटी**–स्त्री., पारदयोग० नागवत्सनाभहरितालमनःशीलादियुक्तः, अयं योगः ग्रहणीपाण्ड्वाद्यनेकव्याधिहरः ( र. १६.७६ )
पाऱ्याचा एक योग. शिसे, बचनाग, हरताळ, मनशीळ इत्यादी युक्त. ग्रहणी, पांडु इत्यादी अनेक रोग नाशक.

**सर्वाशय**–पु., शरीरं देहः, च ( चवि. २.१८ )
देह, शरीर.

**सर्वेश्वर**–पु., पारदयोग० ताम्रगन्धकाऽभ्रकलोहवत्सनाभादियुक्तः भस्मानि प्रत्येकं चतुष्पलं, कर्षमात्रं च प्रत्येकं लोहपारदयोर्भस्म स्नुह्यर्कक्षीरैरण्डजम्बीरोशीरद्रवेण मर्दयित्वा दिनत्रयं वालुकायन्त्रे स्वेदयेत्। तत्र च पिप्पलीं कर्षमात्रां वत्सनाभं च निष्कमात्रं प्रक्षेपयेत् । मात्रा–गुञ्जा । अयं प्रसुप्तिविनाशकः ( र. २०.२३-२५ )
पाऱ्याचा योग. ताम्र, गंधक, अभ्रक, लोह, बचनाग हीं प्रत्येकी १६ तोळे; एकएक तोळा लोह पारदाचे भस्म, निवडुंग, रुई यांचे दूध व एरंड, ईडनिंबू, वाळा यांच्या रसात मर्दन करून ३ दिवस वालुकायंत्रात स्वेदन करावे. त्यात पिंपळी १ तोळा आणि बचनाग चार मासे मिश्र करावा. घेण्याचे प्रमाण– एक गुंज. असा हा योग नष्ट झालेले स्पर्शज्ञान नाहीसे करतो. सुनबहिरी नाशक.
पारदयोग० गन्धताम्राभ्रलोहहिङ्गुलवज्रभस्महरितालसत्वादियुक्तः अयं मण्डलाख्यकुष्ठनाशकरः ( र. २०.१८१ )
पाऱ्याचा एक योग. गंधक, ताम्र, अभ्रक, लोह इ० युक्त. हा मंडलकुष्ठ नाशक.
पारदयोग० समुद्रफेनमृगविषाणसमुदायादियुक्तः, अयं उन्मादापस्मारनाशकः ( र. २३.१७-२१ )
पाऱ्याचा एक योग. समुद्र फेस, मृगशृंग इत्यादीयुक्त. हा उन्माद, अपस्मार नाशक.
पारदयोग० लोहहिङ्गुलादियुक्तः अयं स्पर्शवाततपनुत् ( र. २१.१४-१८ )
पाऱ्याचा एक योग. लोह, हिंगूळ इत्यादी युक्त. हा स्पर्शनाश नाहींसा करतो. स्पर्शवातनाशक.

**सर्वेश्वरपर्पटी**–स्त्री., पारदयोग० लोहगन्धकरत्नादियुक्तः पर्पटीकल्पः, सोऽयं विद्रधिपाण्डुग्रहणीप्लीहायकृत्प्रमेहादिनाशनः ( र. १८.४-२० )
पाऱ्याचा योग. लोह, गंधक, रत्ने इत्यादीयुक्त पर्पटी. ही विद्रधि, पांडु, ग्रहणी, प्लीहा, यकृत, प्रमेह, इत्यादी नाशक.

**सर्षप**–पु., वनस्पति० स्नेहयुक्तद्रव्यविशेषः ( चसू. १३.१० ) धूपनद्रव्यम् ( सुसू. १९.२८ ) गुणाः–कटुस्तिक्तः अत्युष्णो रक्षोघ्नो रुच्यः कफवातघ्नः कृम्यामकण्डूकुष्ठश्रवणरोगशीर्षरोगवातरक्तत्वग्दोषविषभूतव्रणहरश्च ( ध. ४.४२ ) बीजतैलं कुष्ठादिरोगहरप्रदेहे ( चसू. ३.६ ) बीजस्योपयोगः शिरोविरेचने ( चसू. २.३-५ ) नाडीस्वेदार्थमुपयुक्तमेकं द्रव्यम् ( चसू. १४.३१ ) अयं

शोथस्य पाचनं करोति ( सुसू. ३७.९ ) श्वेत-सर्षपः ( सुचि. ५.३७ )
हिं.—सर्षो, सरसो.
**म.—शिरस, मोहरी.**
गु.—सरशव.
बं.—सरिषा.
ता.—आवाळु.
मोहरी. तेलाचा पदार्थ. गुण—तिखट, कडु, अतिशय उष्ण, भूत पिशाच्च नाशक, रुचकर, कफवातनाशक. कृमि, आम, कुष्ठ, खाज, कानाचे रोग, डोक्याचे रोग, वातरक्त त्वग्दोष, विष, व्रणनाशक. बियांचे तेल— कुष्ठादी रोगात अभ्यंग करण्यासाठी व बियांचा लेप सुजेला पिकवितो. डोक्याला रेचक देण्यास तसेच नाडीस्वेदाकरिता व धुरी देण्यास उपयुक्त.
**शाक० कृमिहरः** ( चवि. ७.१७ )
मोहरीची भाजी कृमिनाशक.
**मान० षण्मरीचिसाम्मितः मानविशेषः** ( चक. १२.८७; र. ११.२ )
वजन, आकारमान. सहा मरीचि हे एक वजन.
**विष० तदिदं विषं पीतवर्णम्** ( र. २९.१७; अहसू. १५.१; असंसू. १४ )
पिवळ्या रंगाचे एक विष.

**( सर्षपी )**–स्त्री., **रोग० मेहपीडका सर्षपिका** ( चसू. १७.८३ ) **द्र० ' प्रमेहपीटिका '**
प्रमेहातली एक पुळी. पहा ' प्रमेहपीटिका. '
**शूकरोग०** ( सुचि. २१.३ )
लिंग मोठे करण्याच्या क्रियेत होणारा रोग.

**–कन्द**–पु., **कन्दविषभेदः** ( सुक. २.५ )
विषारी कंदाचा एक प्रकार.

**–तैल**–न., **तैल० सर्षपबीजोत्थतैलम्, तच्च प्रमेहे शाकसिध्द्यर्थमुपयुज्यते** ( सुचि. ११.६; ध. ६.१३० ) **उन्मादे नस्यत्वेन समुपयोज्यम्** ( सुउ. ६२.१६ )
मोहरीचे तेल. मोहरीच्या दाण्याचे तेल. ते प्रमेहात भाजीपाला फोडणी–करिता योजतात. उन्मादात नस्य म्हणून योजावे.

**–शाक**–न., **शाकानामहिततमम्** ( चसू. २५.३९ )
मोहरीच्या पानादिकांची भाजी सर्व पालेभाज्यात अहितकर आहे.

**–स्नेह**–पु., **सर्षपस्य तैलम्, उन्मादे सर्षपतैलेन नस्याभ्यङ्गादिकं कार्यम्** ( सुउ. ६२.१६ ) **द्र० 'सर्षपतैल.'**
सरसूचे तेल. उन्मादात सरसूच्या (मोहरी) तेलाने नस्य आणि अभ्यंग वगैरे कार्य करावे.

**सर्षपक**–पु., **कीट० प्राणनाशनः** ( असंउ. ४३ ) **शकृन्मूत्रयोरेवास्य विषमस्ति** ( सुक. ३.५ )
एक विषारी किडा. प्राण नाशक. याच्या मळमूत्रातच विष आहे.

**सर्षपाह्वय**–पु., **कन्दविष० सर्षपकन्दः, अयं स्निग्धघनगुरुकर्मण्यगुणः** ( असंउ. ४८ )
एक विषारी कंद. हा स्निग्ध, घन, जडत्व निर्माण करण्याच्या ठिकाणी अनुपयुक्त.

**सर्षपिक**–पु., **सविषकीट० गुणाः– प्राणनाशनस्तेन दष्टस्य वेगज्ञानं सर्पवद्भवति तास्ताश्च तीव्रा वेदना भवन्ति, तथा च सान्निपातिकाः रोगाः जायन्ते दंशस्तु वर्णेन रक्तपीतसिताऽरुणः क्षाराग्निदग्धवच्च ज्ञेयः** ( सुक. ८.१५-१८ )
विषारी किडा. याचा दंश होतो ती जागा. तांबडा, पिवळा, पांढरा, लालसर, क्षार किंवा अग्नीने जाळल्या सारखी होते. हा चावला तर सर्पाप्रमाणे वेग येतात. हा त्रिदोष प्रकोपी रोग करतो. त्या त्या वेदना तीव्र असतात. प्राणनाशक आहे.
**गुह्यरोग० अस्मिन्रोगे गुदस्य बहिरन्तर्वा जाताः कफरक्तजाः सर्षपप्रमाणसंस्थाना घनाः पिटिका भवन्ति** ( असंउ. ३८ )
गुह्यरोग. गुदाच्या बाहेर व आत कफ व रक्तदुष्टीने मोहरी एवढ्या व आकाराच्या घट्ट पुळ्या होतात.

**( सर्षपिका )**–स्त्री., **रोग० प्रमेहपिटका, शीघ्रपाका, महावेदना, सर्षपाकृतिप्रमाणा सर्षपिका तद्विधाभिश्च पिटकाभिर्व्याप्ता जायते** ( असंनि. १०.४२ )
एक रोग. प्रमेहात उपद्रव म्हणून होणारी पुळी. मोहरीच्या आकाराच्या व तेवढ्याच तिच्यासारख्या अनेक पुळ्यांनी ती व्याप्त असते. फार मोठ्या वेदना होतात.
**कीट० गलगोलिकाभेदः** ( सुक. ८.२९ )
एक किडा. गलगोलिका प्रकार.

**सलवण**–न., **खनिज० वज्रम्** ( ध. ६.१३ ) कथील.

**सलिल**–न., **जलम्** ( चक. १२.१००; ध. ६.३०२, र. २०.५४-५५ ) पाणी.

**–ज**–न., वनस्पति० **कमलम्** ( रा. १०.२४४ )
कमळ.
**–प्रकाश**–वि., पु., **अच्छः** ( सुसू. २२.८ )
पाण्यासारखा स्वच्छ (स्राव)
**–रिपु**–पु., वनस्पति० **अगस्त्यः** हदगा.
**भल्लातकः** ( र.३०.४८-४९ ) बिब्बा, भिलावा.
**समुद्रशोषः** ( र. १७.६७-६८ ) समुद्रशोष.
**काम्भिकशाकः** ( र. १७.६७-६८ ) एक भाजी.

**सलून**–पु-, कृमि० **पुरीषकृमिः** ( असंनि. १४.५८ )
एक कृमि. मळातला.

**सल्लक**–पु., वनस्पति० **सल्लकी** ( रा. १२.१९५ )
साळई.

**( सल्लकी )**–स्त्री., वनस्पति० **गुणाः–कषाया तिक्ता मधुरा शीता ग्राहिणी कफपित्तवातघ्नी कुष्ठरक्तविकाराऽर्शोव्रणदोषहरा च**
( ध. ३.१३५; सुचि. २१.१०; असंसू. १५.३२ )
साळई. गुण-तुरट, कडू, गोड, थंड, मळ बांधणारी तिन्ही दोषनाशक, कुष्ठ, रक्तविकार, मूळव्याध, व्रणदोषहर.
हिं.—सालई.
**म.—साळयी.**
गु.—सालेडुं.
बं.—शलई.
ता.—परङ्किसाम्प्राणि.

**सल्ली**–स्त्री., वनस्पति. **सल्लकी** (रा. ११.१९५) साळई.

**सव**–पु., **प्रसवः** (का रेवतीक. ४२)
प्रसव, प्रसूति, बाळंत होणे.

**सवन**–न., **यज्ञः** (चचि. १(४).४७) यज्ञ.
**जननम्** (सुसू. ३.१२) जनन, उत्पत्ति, जन्म.

**सवर्ण**–वि., **त्वक्समानवर्णः** (अहृसू. २९.२)
त्वचेच्या समान वर्णाचे, त्वचेच्या रंगाचे.

**(सवर्णा)**–स्त्री., **सङ्कीर्णा लूता, सा चोपपादिका उच्यते** (असंउ. ४४)
एक किडा. तिला उपपादिका असे म्हणतात. लूता किड्याची मिश्र जात.
**–करण**–वि.,न., **सवर्णकरणम्, स्वाभाविकवर्णोपादनम्** (सुचि. १.९५)
मूळच्या त्वचेच्या वर्णासारखा वर्ण करणारे.
( हिरडा किंवा कडू भोपळा. )

**सवर्णीकरण**–वि., **वर्णसमानं यः करोति, सः (लेपः)**
(चचि. २५,११६, असंउ. ३०,)
त्वचेच्या समान वर्ण करणारा. ( लेप ).

**सवातिक**–वि., **वातिकोत्तरवातिकः**
( चक्र. चचि. ८.७३) द्र० 'वातिक' 'उत्तरवातिक'
स्वल्प वातनाशक औषधीगण म्हणजे वातिक आणि अतिवातनाशक औषधीगण म्हणजे उत्तरवातिक. अशा दोन्ही प्रकारच्या गणांना सवातिक हे नाव आहे.

**सवितृ**–पु., वनस्पति० **अर्कः** ( रा. १०.२५ ) रुई.

**सव्यपाणि**–पु., **वामकरः** ( ड. सुचि. ३८.३ )
डावा हात.

**सव्यभिचार**– तन्त्रयुक्ति० **अनैकान्तिको हेत्वाभासः साध्याभाववति हेतोर्वृत्तित्वम्** ( चवि. ८.४५ )
एक तंत्रयुक्ति. अनैकांतिक हेत्वाभास. साध्याचा अभाव असणाऱ्या ठिकाणी हेतु असणे.

**सव्यसाचिन्**–पु., वनस्पति० **अर्जुनः** ( रा. ९.१९२ )
अर्जुन.

**सव्यात्तगर्भा**–वि., **सव्येन पार्श्वेनाऽऽत्तो गृहीतो गर्भो यया, सा** ( चशा. २.२४ )
डाव्या कुशीस जिने गर्भ धारण केलेला आहे ती.

**सव्रणशुक्र**–न., नेत्ररोग० **नेत्रस्य कृष्णमण्डले सूच्या विद्धमिवान्तःप्रविष्टरूपं वर्तुलं प्रतिभाति। तत्र उष्णाश्रुताऽत्यर्थं पीडा च भवति** ( सुउ. ५.४ )
डोळ्याचा एक रोग. डोळ्याच्या काळ्या मंडळावर–बुबुळावर सुईने भोक पाडल्यासारखे आत गेलेले वर्तुळाकार भोक दिसते त्यांत उष्ण अश्रु व अतिशय वेदना होतात.

**सव्रणशुक्ल**–न., नेत्ररोग० **सव्रणशुक्रम्** ( सुउ. ५.४ )
' सव्रणशुक्र ' पहा.

**सशूलक**–पु., कृमि० **पुरीषजः क्रिमिः**
( चसू. १९.४(९)
मळातील ( पुरीष ) क्रिमि.

**सश्यामा**–स्त्री., वनस्पति० **व्रीहिः** ( रा. १६.९८ )
एक तांदूळ.

**ससंभ्रम**–वि., **संभ्रमेण सहितः, भीतिजनकः**
( चवि. ३.७(३)
संभ्रमयुक्त, भीतिजनक.

**ससार**–पु., भैषज्य० **स्फटिकः** ( चचि. १७.१२५ )
स्फटिक,

न., अगरुभेदः, कृष्णागरु ( ध. ३.२७ )
द्र० 'अगरु'

अगरुप्रकार; काळा अगरू. पहा 'अगरू'

**सस्नेह**-वि., ईषत् स्निग्धम् ( चसू. १.६० )
थोडे स्निग्ध. थोडया स्नेहाने युक्त.

**सस्य**-न., खनिज० सस्यकं तुत्थम् ( र. २.१३८ )
मोरचूद.
निस्तुषमपक्कं धान्यम् ( र. २.४७-४८; असंसू. ४.३९ )
तुष काढलेले. न शिजवलेले धान्य.

**-संवरक**-पु., वनस्पति० सर्जकः ( ध. ५.१२३ )
राळ.

**-संवरण**-पु., वनस्पति० जरणद्रुमः ( रा परि. ९.१३ )
अश्वकर्णाचा प्रकार, शालाचा प्रकार.

**सस्यक**-न., खनिज० महारसेष्वेकम् ( ध परि. ६.१ )
तुत्थखनिजसाररूपम् ( र. ६.४३ ) तुत्थकम् ( र. २.१ )
महारसातील एक. मोरचूद.

**सह**-पु., कालविभाग० मासः मार्गशीर्षः ( चक्र. चसि. ६.५ )
मार्गशीर्ष महिना.
भैषज्य० नखम् ( ध. ३.५८ ) नखला.

**( सहा )**-स्त्री., वनस्पति० तरणी ( ध. ५.१४५ )
काटेशेवती.
माषपर्णी ( सुचि. ५.१२ ) रानउडीद.
मुद्गपर्णी ( ड. सुक. ७.२०-२१; र. ११.९०-९२ )
रानमूग.
जीमूतकः ( रा. ३.२४३ ) देवडांगरी.

**-कार**-पु., वनस्पति० आम्रः
( ध. ५.१; असंउ. २०; अहृसू. ३ १२ ) आंबा.

**-कारतैल**-न., तैल० आम्रफलमज्जस्नेहः ( सुउ. ४५.१२७; ध. ६.१४३ )
आंब्याच्या कोयीचे तेल.

**-काररस**-पु., आम्ररसः ( असंसू. ७.१९०-९१ )
आंब्याचा रस.

**-चर**-पु., वनस्पति० झिण्टी
( चचि. २६.२६४; सुसू. ३९.७ ) निळी कोऱ्हांटी.

**( -चरी )**-स्त्री., वनस्पति० कुरण्टः ( रा. १०.४१९ )
कोऱ्हांटा.

**-चरद्वय**-न., कण्टशेलुद्वयम् ( सुसू. ३८.१२-१३ )
कण्ट व शेलु ही जोडी. दोन प्रकारची कोऱ्हांटी.

**-चारिन्**-वि., सहयायी ( चसू. २७.४३ )
बरोबर जाणारा, सहचारी.

**-ज**-वि., जन्मबलप्रवृत्तम् ( सुनि. १३.४४ )
जन्माबरोबरच असलेला.
न्यच्छोल्वकाद्योरोगः लांच्छन (लासे) उल्बक रोग.

**-जसात्म्य**-न., स्वाभाविकसात्म्यीभावः ( चचि. २६.२९३ )
जन्मापासून आत्मसात् होणे. स्वाभाविक आत्मसात होणे, मानवणे.

**-देव**-पु., वनस्पति० नीलिनी ( ध. १.२३३ )
काळा दाणा.

**( -देवा )**-स्त्री., बलाभेदः ( सुशा. २.३२ )
चिकणाप्रकार.
वनस्पति० गाङ्गेरुकी ( ड. सुचि. ५.१२ ) गुणाः-
मधुराम्ला कषाया उष्णा गुरुः कटुस्तिक्ता वातघ्नी व्रणपित्तविकारजिच्च
( ध. १.२८५; असंशा. १.६१ )
गांगेरुकी—गोड, आंबट, तुरट, तिखट, कडु, उष्ण, जड, वातनाशक, व्रण पित्तविकार नाशक.
महाबला ( ध. १.२८२ ) मोठा चिकणा, मुद्रिका.

**( -देवी )**-स्त्री., वनस्पति० महाबला
( ध. १.२८२; र. १३.१३-१५ )
मोठा चिकणा, मुद्रिका.

**सहस्**-पु., कालविभाग० मार्गशीर्षः मासः
( चक्र. चचि. १.(२)९३; असंउ. ४९ )
मार्गशीर्ष महिना.

**सहसा**-( अव्य. ) झटिति ( अहृसू. ७.४९ ) अविमृश्यैव ( ड. सुउ. ४७.४९ )
झटकन. ताबडतोब. विचार न करताच.

**सहस्य**-पु., कालविभाग० पौषमासः
( चचि. १(२)१३; सुसू. ६.६; असंउ. ४९ )
पौष महिना.

**-प्रथम**-वि., कालविभाग० सहस्यः पौषः, तस्य प्रथमः ( मार्गशीर्षः ) ( चसू. ७.४६ )
सहस्य म्हणजे पौष त्याचा प्रथम म्हणजे अगोदरचा मार्गशीर्ष.

**सहस्र**-न., सङ्ख्या० दशशतम् ( रा. ८.२३० )
दहा शंभर. हजार.

**–काण्डा**–स्त्री., वनस्पति० **दूर्वाभेदः, श्वेतदूर्वा** (रा. ८.२३०) द्र० '**दूर्वा**' पांढरी दूर्वा.

**–दंष्ट्र**–पु., मत्स्य० **महापाठीनो नादेयः** (सुसू. ४६.११३)
महापाठीन नावाचा नदीतला एक मासा.

**–धौतघृत**–न., घृत० **जलेन ताम्रादिपात्रे सहस्रवारं धौतं घृतम् तच्च दाहज्वरशमनार्थमुपयुक्तम्** (चचि. ३.२५७)
तांब्याच्या परातीत (तूप) हजार वेळा पाणी घालून ते फेसून धुतलेले तूप. ते दाह, ताप नाशक.

**–पत्र**–न., वनस्पति० **कमलम्** (रा. १०.२४४; असंसू. २१.५)
कमळ.

**–पर्वन्**–स्त्री., वनस्पति० **दूर्वाभेदः श्वेतदूर्वा** (रा. ८.२३०) द्र० '**दूर्वा**' पांढरी दूर्वा.

**–पाक**–वि., **सहस्रवारं कृतः पाकसंस्कारः यस्य, सः (स्नेहः)** (चवि. ६.१६)
औषधी द्रव्यानी युक्त करून हजार वेळा उकळविलेले–संस्कार केलेले तूप तेल इ० स्नेह.
वि., **सहस्रधा वृतपाकम् (घृतम्)** (चवि. १(२).४)
हजार वेळा संस्कार करून कढवलेले (तूप).

**–पाक**–न., **संस्कार० सहस्रवारं पाचितं तैलम्** (सुचि. ४.२९)
हजार वेळा संस्कार केलेले, पचवलेले (तेल.)

**–मूर्धन्**–वि., **सहस्रमूर्धानमिति सहस्रशीर्षा इत्यादि वेदप्रतिपादितः। नामसहस्रेण इत्यादि महाभारतोक्ता नामसहस्रेण प्रतिपादितः (विष्णुः)** (चक्र. चचि. ३.३११)
हजार डोकी असलेला वेदाने सांगितलेला (विष्णु) सहस्र नावांनी महाभारताने वर्णिलेला (विष्णु)

**–मूली**–स्त्री., वनस्पति० **द्रवन्ती** (रा. ५. ३४७)
उंदीरकानी.

**–वीर्य**–वि., **बहुतरशक्तियुक्तम्** (अहसू. ५.३९)
फार शक्तिमान. बलाढ्य.

**(–वीर्या)** स्त्री., वनस्पति० **दूर्वा च** (चसि. १२.१९(३) **श्वेतदूर्वा** (सुसू. १९.२९) द्र० '**दूर्वा**'
दूर्वा. पांढरी दूर्वा. पहा 'दूर्वा.'
**शतावरी** (ध. १.२९३) शतावरी.

**–वेध**–न., आसुत० **सूक्तम्** (ध. ६.२४६)
शिरका, आंबट शिरका.

**–वेधिन्**–न., निर्यास० **हिङ्गु** (रा. ६.६०) हिंग.
पु., वनस्पति० **अम्लवेतसः** (रा. ६.१४८) अम्लवेतस.
भैषज्य० **कस्तूरिका** (रा. १२.४७) कस्तूरी.

**–संपाताभिहुत**–पु., संस्कार० **हवनम्, सहस्रसंपाताभिहुतं कृत्वा सहस्रसंपाताध्याय ऋग्वेदे पठ्यते, तैः मन्त्रैः सहस्र हुत्वोपयुञ्जीत। जेज्जटस्तु-संपातशब्देन यज्ञिकानां स्रवणं तथा हि आहार्यं संस्कृत्य द्रव्याणि हूयन्ते, हुत्वा हुत्वा च पानीयादिपूर्णपात्रे संस्राव्यन्ते। एतदुक्तं भवति; सहस्रसंपतनं, यस्मिन्नभिहुते तत्तथा, तत्कृत्वोपयुञ्जीतेत्यर्थः। गयीतु अथर्ववद्भिः संपातक्रमेणौषधाऽधिकारिणा मन्त्रेण त्रिपदा गायत्र्या वा प्राक्तनकर्मक्षयार्थं विघ्नशान्त्यर्थमभिमताशीप्राप्त्यर्थं वा सहस्राभिहुतं कृत्वा द्रव्याणि प्रयुज्यन्ते** (ड सुचि. २७.८)
होमाचा एक संस्कार. ऋग्वेदात सहस्रसंपात हा एक अध्याय आहे. त्या मंत्रानी हजार वेळा होम करणे. **जेज्जटमत**— संपात म्हणजे याज्ञिकांचे स्रवण. आहाराच्या संस्कार केलेल्या पदार्थांचा होम करतात. प्रत्येक होमाच्या वेळी–आहुतीच्या वेळी पाण्याच्या पूर्णपात्रात थोडे थोडे शेष द्रव्य टाकले जाते म्हणून हवनाच्या वेळी हजार वेळा शेषद्रव्य ज्यात टाकले जाते ते. हे करून त्याचा उपयोग करावा. **गयीचे मत**— अथर्ववेदज्ञ औषधाकरिता उक्त मंत्राने किंवा त्रिपदा गायत्री मंत्राने प्राक्तन कर्म क्षयाकरिता विघ्ननाशाकरिता इच्छित आशीर्वाद प्राप्त व्हावा म्हणून औषधींचा हवन करण्याच्या उक्त क्रमाने हजार वेळा आहुती देऊन औषधीद्रव्यांची योजना करतात.

**सहस्रांशी**–स्त्री., वनस्पति० **पीलुः** (ध. ५.५१) पीलु.

**सहस्राक्ष**–पु., देवता० **इन्द्रः** (चसू. १.१८; र. ७.१-२, अहसू. १.३)
इंद्रदेव, देवांचा राजा.

**सहस्राक्षदिश्**–स्त्री., **इन्द्रस्य नाम इंद्रेणाधिष्ठिता दिशा, प्राची** (र. ७.१-२)
इंद्राची–इंद्राने आधिष्ठित दिशा पूर्व.

**सहा**–स्त्री., काटेशेवती रानमूग.

**–चर**–पु., वनस्पति० **सहचरः** (ध. १.२७८)
निळी कोऱ्हांटी.
**सैरेयः** (चचि. २८.१६१; अहसू. १५.२४)
कोऱ्हांटी.

**नीलपीतझिण्टी** ( असंचि. ५; सुचि. ३७.२० )
निळी पिवळी कोन्हांटी.
**-द्वय**-न., **शिम्बीधान्य० मुद्गपर्णी माषपर्णी च** ( अहसू. १०.२४; सुसू. ४६.४६ )
रानमूग व रानउडीद ही जोडी.
**सहाय**-पु., **मित्रम्** ( असंसू. ३.४३ ) मित्र.
**सहिष्णु**-वि., **क्षमायुक्तः** ( सुउ. ६०.११; सुशा. ४.७२ )
सहनशील, क्षमायुक्त, सोशिक.
**-ता**-स्त्री., ( परिव० ) **सहनशीलता अक्रोधनत्वम्** ( सुउ. ६०.४ )
सहनशीलता, न रागावण्याचा स्वभाव, सोशिकपणा.
**सह्य**-पु., **पर्वतः सह्याद्रिः** ( सुचि. २९.२७; अहसू. ५.११ )
सह्य पर्वत. सह्याद्रि.
**सांकथ्य**-न., **कथनम्** ( चचि. २४.४५ )
सांगणे, कथन, कथन करणे.
**सांकृत्य**-पु., **ऋषि०** ( चसू. १.११ ) एक ऋषि.
**सांकृत्यायन**-पु., **महर्षि० कुशः** ( चसू. १२.४ )
एक महर्षि. कुश.
**सांकोचकविष**-न., **कन्दविष०** ( असंउ. ४० )
एक विषारी कंद.
**सांख्य**-पु., **तत्त्वज्ञः सांख्यदर्शनज्ञः** ( चशा. १.१५१ )
तत्वज्ञ. सांख्यशास्त्रज्ञ. सांख्यदर्शनाचे तज्ञ.
**ऋषि० रोगापहरणचिन्तनार्थं हिमवतः पार्श्वे समेतेषु महर्षिष्वेकः** ( चसू. १.८ )
रोगोपचाराच्या विचारविनिमयाकरिता हिमालयाच्या उतरणीवर एकत्र जमलेल्या महर्षींतील एक.
न., **सांख्यदर्शनम्** ( चशा. १.१५१ )
सांख्य दर्शन, सांख्य शास्त्र.
**सांग्राहिक**-वि., **ग्राही** ( चचि. १९.५६; सुसू. ४१.६ )
मळ बांधणारा.
**अतिसारप्रवाहिकानिश्चारकादिविनाशकः** ( सुउ. ४०.१४७ )
अतिसार, आवरक्त व तज्जन्य मलक्षय नाशक.
**( सांग्राहिकी )**-वि., **पुरीषसंग्रहकारिणी ( यवागूः )** (चसू. २.२८)
मळाचा संग्रह करणारी-बांधणारी पेज.
**सांध्यकुसुमा**-स्त्री., **वनस्पति० त्रिसंधिः** ( रा परि. १०.३७ ) तिरसदी.
**सांनिध्य**-न., **आश्रितत्वम्** ( ड सुशा. ३.३ )
सहवास, जवळ असणे. आश्रित असणे.
**संयोगः** ( सुशा. २.३३ ) संयोग.

**सांनिपातिक**-वि., **त्रिदोषजः ( ज्वरादिः )** ( चनि. १.२९ )
त्रिदोषज ( ज्वर इत्यादि रोग. )
**सांनिपातिकोदर**-पु., **रोग० उदरभेदः, दूष्योदरम्** ( सुचि. १४.३ ) त्रिदोषज उदर रोग.
**सांपन्निक**-वि., **संपन्न एव सांपन्निकः** ( चचि. १(४).३ )
संपन्न, श्रीमान, संपत्तियुक्त.
**सांसर्गीक्रिया**-( परिव. ) स्त्री., **पेयादिक्रमः** ( चचि. १९.६१ )
मंड, पेज, अटवल, इत्यादी क्रमाने अन्न घेणे.
**साकुरुण्ड**-पु., **वनस्पति० गुणाः-कषायः लघुः रुचिकृद्दीपनः, वस्त्ररञ्जनकः, श्लेष्मवातापहारी च** ( रा परि. ६.१६ )
गाठाळ व अनेक रंगाचे फळ असलेली वनस्पती.
**गुण**—तुरट, हलकी, रुचकर, दीपक, कफवातनाशक, वस्त्राला रंग देण्याच्या कामात उपयोगी.
**साकुक**-पु., **कन्दविष०** ( असंउ. ४० ) **तच्च स्निग्धं घनं गुरु कर्मण्यं च** ( असंउ. ४८. )
एक विषारी कंद. गुण— स्निग्ध घट्ट जड व विषकार्य करण्यास समर्थ.
**साक्षिन्**-वि., **द्रष्टा** ( चशा. १.५ ) **ज्ञाता** ( सुशा. ३.४)
पहाणारा, साक्षी, ज्ञाता, जाणता.
**(साक्षि)-भूत**-वि., **साक्षिसदृशः** ( चशा. १.१० )
साक्षीभूत, साक्षी सारखा.
**साग**-पु., **वनस्पति० गुणाः-मधुरः कषायः कफघ्नः पित्तदाहश्रमापहः रुच्यश्च** ( ध. परि. ५.३ )
हिं—सागवन.
**म.—साग.**
गु.—साग.
बं.—शेगुनगाछ.
ता.—टेक्कू.
साग. गुण— गोड, तुरट, कफ-पित्तदाह, श्रम नाशक, रुचि उत्पन्न करणारा.
**सागर**-पु., **लवण० सामुद्रलवणम्** ( र. २०.२२२. )
मीठ.
**भैषज्य० समुद्रफलम्** ( र. २०.२२२ )
समुद्रफळ.
**-ज**-न., **लवण० सामुद्रलवणम्** ( ध. २.३४ ) मीठ.
**भैषज्य० समुद्रफेनम्** ( ध. ३. १५४ )
समुद्रफेस.

वनस्पति० ऋद्धिः ( रा. ५.१८७; पृ. ३४ )
अष्टवर्गातील एक वनस्पती.

वि., **चिकित्सायामनुभूतफलम्** ( भेषजादि ) ( र. १.८ ) **निश्चितफलप्रदम्** ( सुचि. ९.११ )
उपचारांचे अनुभवाला आलेले फळ. ( औषध इत्यादी निश्चित फळप्रद.

**स्वेदितम्, साधितम्, पाचितम्** ( र. २.८६; अहृसू. ४.२१ )
वाफवलेले, साधलेले, पचवलेले, पूर्ण तयार झालेले.

**–नाथ**–पु., **प्राचीनो रसाचार्यः** ( र. १७.१२० )
रसशास्त्रातील प्राचीन आचार्य.

**–पिण्डिका**–स्त्री., **अग्निपाचितः सक्त्वादीनां पिण्डः** ( चसू. २७.३३९; असंसू. ७.२२२ )
सातूच्या पिठाचा अग्नीने शिजविलेला पिंड, गोळा.

**–पुष्प**–पु., **वनस्पति० करवीरः** ( रा. १० ३; पृ. १३४ ) कण्हेर.

**–प्रयोजन**–पु., **वनस्पति० सर्षपः** ( रा. १६.६८; पृ. १४३ ) मोहरी.

**–बस्ति**–पु., **बस्तिप्रकारः बलोपचयवर्णानां व्याधिशतस्य च बस्तिनाऽनेन सिद्धिर्भवतीति सिद्धबस्तिः** ( सुचि. ३८.११६ ) **तथा चायं सर्वदेहिनां सर्वदा हितो बहुफलो बलपुष्टिकरो निर्व्यापच्च** ( असंक. ५ ) **अस्य सामान्यद्रव्याणि–यवकोलकुलत्थानां क्वाथो मधु पिप्पली सैन्धवं यष्टिमधु च** ( सुचि. ३८.१०५ )
बस्तीचा प्रकार. यातील सामान्य द्रव्ये. जव, बोर, कुळीथ, यांचा काढा. पिंपळी, ज्येष्ठमध, सैंधव आणि मध.
शक्ति, शरिराची वाढ आणि देहाची कांती वाढवणे व शेकडो रोगांना जिंकण्यात सिद्धि मिळते म्हणून ह्या बस्तीला सिद्धबस्ती म्हटले आहे. हा बस्ती सर्वांना, नेहमी देता येतो. अपाय होत नाही.

**–मन्त्र**–पु., **निश्चितफलप्रदोऽपराजितादिर्मन्त्रः** ( अहृसू. २.३२ )
निश्चित फळ देणारा अपराजित इत्यादी मंत्र.

**–रसामृत**–न., **देहस्याभ्रकादिलोहा सिद्धिकरास्तथा स्वेदनादिसंस्कारैः सिद्धः पारदः; स एवामृतमिति सिद्धरसायनम् जराव्याधिमरणादिहरमेतत्** ( र. १.१ )
अभ्रक इत्यादी खनिजे व अष्टसंस्कारयुक्त पारा हे देहाला आरोग्य सिद्धि देतात, ते अमृतासारखे म्हणून सिद्धरसायन होत, ते म्हातारपण रोग मरण इत्यादी नाशक आहेत.

**–सर्पिस्**–न., **सिद्धघृतम्, यथा द्विपञ्चमूल्यादिभिः, सिद्धार्थकवचामांसीपयस्यादिभिः, मधुकवचापिप्पल्यादिभिः सिद्धं घृतम्** ( सुशा. १०.४५ )
अन्न खाणाऱ्या मुलांना दशमूलादी, दुधावर असणाऱ्या मुलाना मोहरी इत्यादी, आणि दूध व अन्न खाणाऱ्या मुलांना जेष्टमध इ. औषधांनी सिद्ध केलेले तूप द्यावे म्हणजे बल, पुष्टि, बुद्धि व आरोग्य वाढते.

**–साधन**–पु., **वनस्पति० सर्षपः** ( रा. १६.६८; पृ. १४३ ) मोहरी.

**–साधित**–वि., **श्रीयशोज्ञानसिद्धानां व्यपदेशतो लब्धायुर्वेदविद्यः, सिद्धेन प्रसिद्धेन साधितः नाम ग्राहितायुर्वेदविद्यः** ( चसू. ११.५० )
पैसा, यश व ज्ञान यानी प्रसिद्ध म्हणून वैद्य झालेला.

**सिद्धक**–पु., **वनस्पति० निर्गुण्डी** ( रा.४.११७; पृ.१५० )
निर्गुंडी.

**सिद्धा**–स्त्री., **वनस्पति० ऋद्धिः** ( रानि. १८७; पृ. ३४ )
अष्टवर्गापैकी ऋद्धि नावाची वनस्पती.

**–संज्ञ**–पु., **वनस्पति० बकुलः** ( रा.१०.२६२; पृ.२०२ )
बकुळ.

**सिद्धागम**–वि., **शास्त्रोक्तविधिना सिद्धम्** ( भेषजादि ) ( असंसू. ३३.३४-३५ )
शास्त्रोक्त विधीने सिद्ध झालेले ( औषध इ० )

**सिद्धान्त**–पु., **तन्त्रयुक्तिः परीक्षकैर्बहुविधं परीक्ष्य हेतुभिश्च साधयित्वा यो निर्णयः स्थाप्यते, सः। स च सर्वतन्त्रसिद्धान्तप्रतितन्त्रसिद्धान्ताधिकरणसिद्धान्ताभ्युपगमसिद्धान्तभेदाच्चतुर्विधः** ( चवि. ८.३७ )
सिद्धांत, तंत्र. युक्ति परीक्षकांनी अनेक प्रकारांनी परीक्षा करून, कारणांनी सिद्ध करून जो निर्णय निश्चित केला तो. प्रकार चार–सर्वतंत्रसिद्धांत, प्रतितंत्रसिद्धांत, अधिकरणसिद्धांत आणि अभ्युपगमसिद्धांत.

**सिद्धार्थ**–वि., **अर्थसिद्धियुक्तः, प्राप्तमनोरथः** ( असंसू.२.३९ )
ज्याला पैसा मिळाला आहे असा–पैसेवाला. मनोरथ पूर्ण झालेला.

**सिद्धार्थ**–पु., **वनस्पति० सर्षपभेदः, श्वेतसर्षपः** ( चइ. १२.७७; सुउ. ६१.३१; अहृसू. १५.३३ )
द्र० **'सर्षप'** मोहरीचा प्रकार. पांढरी मोहरी.
**सर्षपः** ( ध. ४.४२; पृ. १४२ ) मोहरी.
**वटः** ( रा. ११.११६; पृ. १८४ ) वड.

**मान० सर्षपः, षड्जमितः** ( र. १०.१०२ )
मोहरीइतके, आकार, वजन. सहा रजःकणा इतके.

**सिद्धार्थक**-पु., **वनस्पति० सर्षपभेदः, श्वेतसर्षपः** ( सुचि. १६.३६; असंउ. ८ ) **द्र० 'सर्षप'**
मोहरी प्रकार. पांढरी मोहरी.

न., **घृत० सिद्धार्थकवचाहिङ्गुप्रियङ्गुद्धिरजनीमञ्जिष्ठाश्वेतकटभ्यादिसाधितं घृतम् । पाननस्याभ्यामिदं सर्वासुरग्रहकृत्याऽलक्ष्मीविषोन्मादज्वरापस्मारनाशनम् ।बस्तमूत्रकल्पितमिदं पाननस्याञ्जनालेपस्नानोद्वर्षणादिभिः सर्वासुरग्रहज्वरापस्मारोन्मादादिनाशनं राजद्वारे सिद्धिकृच्च** ( असंउ. ८ )
तयार केलेले औषधि तूप–मोहरी, वेखंड, हिंग, गव्हला, हळद, दारुहळद, मंजिष्ठ, पांढरी मालकांगोणी, इत्यादींनी तयार केलेले तूप. हे पिण्यास व नाकात घालण्यास उपयुक्त. याने ग्रहबाधा, शाकिनी डाकिनी बाधा, चेहऱ्यावरची कळाहीनता विष, उन्माद अपस्मार व ज्वर नाशक.

**सुरद्रुमवचाकुष्ठसिद्धार्थादिभिः साधितं घृतम् । कृमिकुष्ठगरश्वासबलासविषमज्वरसर्वभूतग्रहोन्मादापस्मारनाशनमिदम्** ( सुउ. ६१.३१-३३ )
देवदार, वेखंड, कोष्ठ, मोहरी इत्यादींनी सिद्ध तूप. कृमि, कुष्ठ, कृत्रिम विष, श्वास, कफ, पाळीचे ताप, सर्व भूतबाधा ग्रहपीडा उन्माद व अपस्मार नाशक.

**स्नान० मुस्तमदनत्रिफलाकरञ्जारग्वधकलिङ्गयवदार्वीसप्तपर्णानां कषायः, अयं वमनो विरेचनो वर्णकरस्तथोद्वर्षः, स्नानोपयोगी च । अनेन त्वग्दोषकुष्ठशोफपांण्ड्वामयाश्च नश्यन्ति** ( चचि. ७.९१; असंचि. २१ )
काढ्याने करावयाचे स्नान. नागरमोथा, गेळफळ त्रिफळा, करंज, बहावा, इंद्रजव, जव, दारुहळद, सातवीण, यांचा काढा. हा वामक, रेचक, वर्ण चांगला करणारा, याचे स्नान करण्याने त्वचेचे विकार कुष्ठ, सूज पांडु यांचा नाश होतो.

**सिद्धार्थकतैल**–न., **तैल० सार्षपं तैलम्, इदं सर्वेषु कुष्ठेषु पानार्थमुपयुज्यते । उत्तरबस्तिविधानेनोपयुक्तं सद् अपराहरणम्** ( सुशा. १०.२१; असंचि.२१ )
मोहरीचे तेल. सर्व कुष्ठात पिण्याकरिता उपयुक्त. उत्तरबस्तीने योनीमार्गात उपयोग केल्यास वार निघते.

**सिद्धि**–स्त्री., **सुष्ठुफलत्वम्, सम्यक्परिणामः** (चसू.१५.४) **साफल्यम्** ( चसू. १.१३५ ) **व्याधिविनाशे कृतहस्तता, सिद्धिर्वैद्यगुणानां श्रेष्ठा** ( असंसू. १३.३ )
चांगले फल मिळणे. चांगला परिणाम. सफलता. व्याधीचा नाश करण्यात हाताला सिद्धि. वैद्याच्या गुणात सिद्धि श्रेष्ठ.

**व्यापत्साधनं भेषजम्** ( चक्र. चसू. १३.७; चवि. ८.३८ )
वांती, रेचक इ० दिल्याने होणाऱ्या अनिष्ट परिणामांची चिकित्सा. औषध उपचार.

**चिकित्सितम्** ( चसू. २८.३०; ड. सुचि. ३५.३३ )
उपचार.

**साधनम्** ( ड. सुउ. ४०.१६६ ) साधन, उपाय.

**तत्त्वज्ञानम्** ( चशा. ५.१९ ) तत्वज्ञान.

**वनस्पति० ऋद्धिः** ( ध. १.१४५; पृ. ३४ )
ऋद्धि. अष्टवर्गापैकी एक.

–**द**–पु., **वनस्पति० पुत्रजीवः**
( रापरि. ९.३१;पृ. ३६.६ ) एक वनस्पती.

–**स्थान**–न.,**स्थान० वमनादीनां वमनाद्यसम्यग्योगजन्यानां व्यापदां भेषजस्य साध्यतारूपा सिद्धिरस्मिन्नोक्ता, चरकेऽष्टमं स्थानम्, काश्यपसंहितायां सप्तमं स्थानम्** ( चसि. ८; कासि. ७ )
चरकातील आठव्या व काश्यपसंहितेतील सातव्या स्थानाचे नाव. यात वांती, रेचक इत्यादींचे अयोग्य परिणाम झाले तर ते नाहीसे करणारे उपचार, औषधे इत्यादीरूप सिद्धि सांगितली आहे.

**सिध्म**–न., **रोग० सप्तमहाकुष्ठेष्वेकम्, श्लेष्ममारुतदुष्ट्याऽस्योत्पत्तिः,तल्लक्षणम्-परुषारुणं विशीर्णं बहिस्तन्वन्तःस्निग्धं शुक्लरक्तावभासमल्पवेदनमल्पकण्डूदाहपूयलसीकं लघुसमुत्थानमल्पभेदकृम्यलाबुपुष्पसङ्काशं च** ( चनि. ५.८ ( ६ ) **कुष्ठमिदं साध्यम्, साध्यमपीदमपचारतोऽसाध्यतामुपयाति** ( चनि. ५.९ ) **एकादशक्षुद्रकुष्ठेष्वेकम्, कुष्ठमेतत् प्राय ऊर्ध्वकाये भवति** ( सुनि. ५.१२ ) **तद्विविधम्–पुष्पिकासिध्मं सिध्मं च । पुष्पिकासिध्मं सुखसाध्यम्, सिध्मं दुःखसाध्यम्** ( ड. सुनि. ५.१२ )
शिबे. सात महा कुष्ठातील एक. कफवात दुष्टीने होते. **लक्षण**—खरखरित, लालसर, पांढरे व लाल छटा असलेले, पापुद्रा सुटणारे, बाहेर पातळ आत स्निग्ध पांढरे लालसर दिसणारे थोड्या वेदना व थोडी खाज. दाह, चिरण्याकृमि, पू व लस असलेले,लहान आकाराचे

व त्वचा थोडीशी फुटणारे, कृमियुक्त, भोपळ्याच्या फुलासारखे, हे साध्य. पण अपचाराने असाध्य सुश्रुत मत–अकरा क्षुद्रकुष्ठांपैकी एक. हे प्रायः छाती, पाठ व वरच्या भागात होते, प्रकार दोन– पुष्पिकासिध्म व सिध्म. पहिले सुखसाध्य दुसरे कष्टसाध्य.

**–लेप**–पु., योग० **कुष्ठतमालपत्रमरिचमनःशिलाकासीसैः सिद्धं तैलं ताम्रभाजने सप्ताहमुषितं लेपात् सिध्महरम् किलासहरं च** ( चचि. ७.११७-११८ )

एक लेप. कोष्ठ, तमालपत्र, मिरी, मनशीळ, हिराकस. यांनी सिद्ध केलेले तेल तांब्याच्या भांड्यात सात दिवस ठेवून त्याचा लेप करावा. म्हणजे शिबे आणि किलास कुष्ठ नष्ट होते.

**सिध्मन्**–न., **सिध्मकुष्ठम्** ( सुनि. ५.१२ ) शिबे.

**सिन्दुक**–पु., वनस्पति० **निर्गुण्डी** ( ध. ४. ८१; पृ. १५० )

निर्गुंडी.

**सिन्दुकच्छपिका**–स्त्री., वनस्पति० **शेफालिनिर्गुण्डी** ( रा. ४.११९; पृ. १५० )

निर्गुंडीचा प्रकार.

**सिन्दुवार**–पु.. वनस्पति० **निर्गुण्डी** ( सुउ. ४५.१६; ध. ४.८१; असंसू. १५.२१; पृ. १५० ) निर्गुंडी.

**सिन्दुवारक**–पु., वनस्पति० **निर्गुण्डी** ( ध. ४.८१; पृ. १५० )

निर्गुंडी.

**सिन्दुवारित**–पु., वनस्पति० **निर्गुण्डी** (अहृसू. ७.२५) निर्गुंडी.

**सिन्दूर**–पु., न., खनिज० **रक्तवर्णं सीसकसत्त्वम्** ( र. २.२५ ) तद्गुणाः–**कटु तिक्तमुष्णं व्रणविरोपणं विषदुष्टव्रणत्वग्दोषकुष्ठविसर्पजीर्णज्वररक्तदोषकण्डूघ्नं च** ( ध. ३.१०१; पृ. ११५ )

शेंदूर, लाल रंगाचे शिशाचे सत्व. **गुण**—तिखट, कडु, उष्ण, व्रण भरून आणणारे, विषाने दुष्ट असा व्रण, त्वचेचे विकार, कुष्ट, धावरे, जीर्णज्वर, रक्तदोष व खाज नाशक.

हिं.—सिंदूर, इंगुर.

**म.—शेन्दूर.**

बं.—सिंदूर.

त.—चेन्तूरं.

फा.—सुरन्ज सन्ग.

**( सिन्दूरी )**स्त्री., वनस्पति० तद्गुणाः–**कटुका तिक्ता कषाया श्लेष्मवातजिच्छिरोर्तिशमनी भूतघ्नी च ।** ( रापरि. १०.१९; पृ. ३६९ )

लालबाण नावाचे गवत. **गुण**—तिखट, कडु, तुरट, कफवात जिंकणारी, डोकेदुखी व भूतबाधानाशक.

**–पुष्पी**–स्त्री., वनस्पति० **सिन्दूरी** (रापरि. १०.१९; पृ. ३६९ )

**–भूषण**–पु., योग० **एकैकं पलं पारदं सिंदूरं च वासारसेन प्रहरमात्रं संमर्द्य चक्रिकां कुर्यात् । पक्वमूषायां पलचतुष्टयं शुद्धगन्धकं क्षिप्त्वा तां चक्रिकां लेपयेत्, लघुपुटेन च पुटेत् । जीर्णे गन्धके चक्रिकां विचूर्ण्य दशगुणेन लोहभस्मना दशांशेन च लशुनेन सह संमर्द्य च चणकमात्रा गुटिकाः कारयेत् । योगोऽसौ पाण्डुकामलानाशनः** ( र. १९.११२-११६ )

पाऱ्याचा योग. चार तोळे पारा व चार तोळे शेंदूर अडुळशाच्या रसाने तीन तास खलून चकत्या कराव्या १६ तोळे शुद्ध गंधक चकत्यांना लपेटून पक्व मूषेत घालून लघुपुट द्यावे. गंधक जीर्ण झाल्यानंतर चूर्ण करून दहापट लोहभस्म त्यात घालून एक दशांश लसूण खलून चण्याएवढ्या गोळ्या कराव्या. पांडु, कावीळ नाशक.

**–रस**–पु., योग० **समप्रमाणौ पारदगन्धकौ त्रिदिनं श्वेताङ्कोलजटारसैः संमर्द्य गुटिकीकुर्यात् । रक्तचित्रकवाराहीपत्रनिर्यासेन च पेषयित्वा सद्योहताजमांसस्य पिण्डे न्यस्य, तैले विपाचितं तैले एव यावत्सिन्दूरवर्णं जायेत, तावत् स्थापयेत् । रसोऽसौ विधिना सेवितश्चेदतिवृष्योऽन्यथा लोचनस्फोटकः** ( र. २७.२०-२३ )

एक पाऱ्याचा योग. पारा, गंधक समप्रमाण घेऊन तीन दिवस पांढऱ्या अंकोलाच्या मुळांची भावना तीन दिवस देऊन, खल करून, लाल चित्रक, डुक्करकंद यांच्या पानांच्या काढ्याने खलून नुकत्याच मारलेल्या बोकडाच्या मांसात ठेवून, तेलात तळून नंतर शेंदराच्या रंगाचा होईपर्यंत ती कज्जली ठेवावी. हा रस विधियुक्त सेवन केला तर अतिशय शुक्रवर्धक होतो; नाहीतर डोळ्याचे विकार होतात.

**सिन्धु**–पु., नदी० **हिमालयप्रभवोऽसौ** ( चचि. १२.४ ) **अत्र चन्द्रमानामकः सोमविशेष उपलभ्यते** ( सुचि. २९.२९ )

नद हिमालयातून उगम पावला. त्या भागात चंद्रमा नामक सोमाचा प्रकार उपलब्ध होतो.

वनस्पति० निर्गुण्डीभेदः, नीलसिन्धुवारः (र. २९.३४) द्र० 'निर्गुण्डी' निळी निर्गुंडी.

न., लवण० सैंधवम् (सुउ. ५२.३०; ध. २.२५; र. २.१६१; पृ. ७३) सैंधव.

खनिज० श्वेतटङ्कणम् (र. ११.५०)
पांढरा टाकणखार.

**–ज**–न., लवण० सैन्धवम् (डल्हणः सुचि. ३७.११; ध. २.२५ पृ. ७३) सैंधव.

**–तीरसम्भव**–न., खनिज० टङ्कणभेदः, श्वेतटङ्कणम् (रा. ६.३१; पृ. ७३) द्र० 'टङ्कणम्'
पांढरा टाकणखार.

**–पर्णी**–स्त्री., वनस्पति० काश्मरी (रा. ९.१४६; पृ. २९)
शिवण.

**–पादप**–पु., वनस्पति० मातुलुङ्गः (ध.५ २३; पृ.१७३)
महाळुंग.

**–पुष्प**–पु., वनस्पति० कदम्बः (रा.९.१७०; पृ.१९०)
कळंब.

**–प्रभव**–न., लवण० सैन्धवम् (सुउ.१२.४६) सैंधव.

**–प्रभूत**–न., लवण० सैन्धवम् (सुउ.११.१७) सैंधव.

**–प्रसूत**–न., लवण० सैन्धवम् (सुउ. १९.१७) सैंधव.

**–वार**–पु., वनस्पति० निर्गुण्डी (चसू. ३.२८; सुक. ६.१४-२७)
निर्गुंडी.

**–वारक**–पु., वनस्पति० निर्गुण्डी श्वेतपुष्पा (ड. सुक. ५.८४)
निर्गुंडी (पांढरी)

**–स्रोतःसमुत्थ**–वि., सिन्धुनद्याःप्रवाहात् प्रभूतं समुत्थं नाम उद्भूतम् (असंउ. ८.९२)
सिंधु नदाच्या प्रवाहात उत्पन्न आलेले.

**सिन्धूत्थ**–न., लवण० सैन्धवम् (ध. २.२५; र. १६.२; पृ. ७३)
सैंधव.

**सिन्धूत्थादिवर्ति**–स्त्री., वर्ति० सिन्धूत्थहिङ्गुत्रिफला-मधूकादिसिद्धा वर्तिः, इयमञ्जनेन श्लेष्माभिष्यन्दहरा (सुउ. ११.६-७)
सैंधव, हिंग, त्रिफळा, मोहाची फुले इ० औषधांनी सिध्द केलेली वात. ही कफज नेत्ररोगावर हितावह.

**सिन्धूद्भव**–न., लवण० सैन्धवम् (सुसू. ४४.९; र. १२.१७-१८)
सैंधव.

**सिन्धूद्भूत**–न., लवण० सैन्धवम् (सुचि. ९.१३)
सैंधव.

**सिप्रायमाण**–वि., (परिव०) शिथिलीभवत् शैथिल्य-मापद्यमानम् "सिप्रायन्ते च गात्राणि लिङ्गं सद्यो मरिष्यतः" चइ. १०.१९)
ढिले होणारे, ढिले होत असलेले, अवयव ढिले होणे तावडतोब मरण्याचे दर्शक चिन्ह आहे.

**सिम्बितिकाफल**–न., फल० बदरभेदः, सिञ्चितिका-फलम् (चसू. २७.१४२)
बोराचा प्रकार, बोर.

**सिरा**–स्त्री., शारीर० (चवि. ५.९) नाडी, प्रणाली (चशा. ७.१४) असृज उपधातुः (सुचि. ४.७) तन्निरुक्तिः–सरणात् सिराः (सुसू. ४.५) तदुत्पत्तिः असृजः सिराणामुत्पत्तिः (चचि. १५.१७) वायुर्मेदसः स्नेहमादाय सिरोत्पत्तिं कुर्यात्। तासां पाको मृदुः (सुशा. ४.३०) तासां प्रभवस्थानं नाभिः (सुशा. ७.४) केषाञ्चिन्मते हृदयमिति (काशा) मध्यमो रोगमार्गोऽयम् (अहसू. १२.४८) गतिभेदात् तास्त्रिविधाः–अधोगा ऊर्ध्वगास्तिर्यग्गाश्चेति (सुशा. ९.९)
चतुर्विधाः सिराः–वातपित्तश्लेष्मरक्तवहभेदात्, सामान्यतः सर्वाः सिराः सर्ववहाः, भूयोव्यपदेशाद् वातवाहिन्यादिसंज्ञा (सुशा. ६.१८) तत्संख्या– मूलसिराश्चत्वारिंशत् वातपित्तकफरक्तवाहिभेदात् प्रत्येकं दश।
सप्त सिराशतानि, एताभिरिदं शरीरं जलहारिणीभिरारामं इव, कुल्याभिः केदार इव चाकुञ्चनप्रसारणादिभिर्विशेषैरुपस्निह्यतेऽनुगृह्यते च (चशा. ७.१४; सुशा. ७.३) तासु वातपित्तश्लेष्मरक्तवाहिन्यः प्रत्येकं पञ्चसप्तत्यधिकं शतम्, वातपित्तकफवाहिनीनां स्वस्वस्थानगतानां प्रत्येकं पञ्चसप्ततिशतम्। रक्तवाहिन्यश्च यकृत्प्लीह्नोः पञ्चसप्ततिशतम्। तासां शाखासु चतुःशतं, कोष्ठे षट्त्रिंशत् शतं, मूर्धनि च चतुःषष्ट्यधिकं शतम्। तत्र शाखाविभागे प्रतिशाखं वातपित्तकफरक्तवाहिन्यः प्रत्येकं पञ्चविंशतिः, एवं प्रतिशाखं सिराशतम्। तथा कोष्ठविभागे श्रोण्यां वातादिवहाः प्रत्येकमष्टौ इति

मिलित्वा द्वात्रिंशत्, पार्श्वयोः प्रत्येकं चतस्र इति मिलित्वा षोडश, पृष्ठे प्रत्येकं षडिति चतुर्विंशतिः, उदरे प्रत्येकं षडिति चतुर्विंशतिः, प्रत्येकं दश च वक्षसीति चत्वारिंशत् सिराः। शिरोविभागे ग्रीवायां प्रत्येकं चतुर्दशेति षट्पञ्चाशत्, जिह्वायां प्रत्येकं नवेति षट्त्रिंशत्, नासिकायां प्रत्येकं षडिति चतुर्विंशतिः, कर्णयोर्वातवहाश्चतस्रः पित्तश्लेष्मरक्तवहाश्च प्रत्येकं द्वे इति दश, नेत्रयोर्वातवहा अष्टौ पित्तश्लेष्मरक्तवहाश्च प्रत्येकं दशेत्यष्टत्रिंशत् सिरा भवन्ति। एवं सप्तशतं सिराणाम्।

वातादिवहानां सिरावर्णाः—वातवहा वातपूरिता अरुणाश्च, पित्तवहा उष्णा नीलाश्च, कफवहाः स्थिरा गौर्यश्च, रक्तवहाश्च रोहिण्यो नात्युष्णशीतलाश्च (सुशा. ७२०; असंशा. ६)

वातादिवहानां सिराणां कर्माणि—प्राकृतो वायुः स्ववहाः सिराश्चरन् क्रियाणामप्रतिघातं बुद्धिकर्मणाममोहं च करोति, स एव कुपितः स्वाः सिराः प्रतिपद्य वातजान् रोगान् करोति। प्राकृतं पित्तं स्वाः सिराः संसर्पद् भ्राजिष्णुताऽन्न रुच्यग्निदीप्त्यरोगताश्च करोति। प्रकुपितं तु पित्तसंभवान् रोगान् करोति। प्राकृतः श्लेष्मा स्वाः सिराश्चरन्नङ्गेषु स्नेहं सन्धिस्थैर्यं बलमुदीर्णतां च करोति। स्वाः सिराः संचरद्रक्तं धातुपूरणं वर्णमसंशयस्पर्शज्ञानादि च करोति। कुपितं सच्च रक्तसंभवान् व्याधीन् करोति (सुशा. ७; असंशा. ६) तत्रावेध्याः सिराः—शाखासु षोडश, कोष्ठे द्वात्रिंशन्मूर्ध्नि च पञ्चाशदिति मिलित्वाऽष्टानवतिरव्यध्याः सिराः

(असंशा. ३.३४; सुशा. ७.२१)

शीर, नाडी, प्रणाली. रक्ताचा उपधातु. जिच्यातून दोष बनण्याच्या अवस्थेत असलेले आणि बनलेले रसरक्त धातु तसेच बनण्याच्या अवस्थेत असलेले मांसादि धातु आणि मल वाहतात ती शीर, उत्पत्ति—मेदाचा स्नेह घेऊन वायु शिरांची उत्पत्ती करतो. त्यांचा पाक मृदु असतो. त्यांचे उगमस्थान नाभी. एक मत–हृदय. हा मध्यम रोगमार्ग. गतिभेदाने तीन प्रकार. वर, खाली व तिरक्या जाणाऱ्या. वातपित्तकफ व रक्त वाहणाऱ्या अशा चार प्रकारच्या. सर्व शिरा सर्व वाहक आहेत. अधिक जे द्रव्य वाहते त्यावरून ते नाव दिले जाते. जसे वातवह, पित्तवह इत्यादी. संख्या—वात, पित्त, कफ, आणि रक्तवाही मूळ शिरा चाळीस. प्रत्येकी दहा. एकंदर शिरा सातशे आहेत. सारणींतील पाण्याने बागेतील झाडांचे व पाटाने शेतातील पिकांचे जसे पोषण होते तसेच शिरांनी सर्व शरिराचे पोषण होते. शिरांमध्ये आकुंचन प्रसरण होण्याची योग्यता असते. वातपित्तकफवाहिन्या स्वतःच्या स्थानात प्रत्येकी एकशेपंचाहत्तर आहेत. यकृतप्लीहेत रक्तवाहिन्या एकशे पंचाहत्तर अशा एकूण सातशे. त्यापैकी शाखात चारशे कोष्ठात १३६ व डोक्यात १६४ अशा एकूण सातशे शिरा. प्रत्येक शाखेत वातपित्तकफरक्तवाहिन्या प्रत्येकी पंचवीस म्हणजे एकंदर प्रत्येक शाखेत १०० शिरा. अंतःकोष्ठातील ओटीपोटात वातादी प्रत्येक ८ एकूण ३२. पार्श्वात वातादी प्रत्येकी ४ एकूण १६. पृष्ठात वातादी प्रत्येकी ६ एकूण २४. उदरात वातादी प्रत्येकी ६ एकूण २४ छातीत प्रत्येकी दहा अशा ४० शिरोविभागात मानेत प्रत्येकी १४ अशा मिळून ५६. जिव्हेत प्रत्येकी ९ अशा ३६ नाकात प्रत्येकी ६ अशा २४ कानात वातवह ४ बाकीच्या प्रत्येकी २ एकूण १० डोळ्यात वातवह आठ, पित्तकफरक्तवह प्रत्येकी दहा अशा ३० एकूण ३८. सर्व मिळून सातशे शिरा.

**वर्ण**—वातवह वाताने भरलेल्या, अरुण रंगाच्या, पित्तवह उष्ण व निळ्या रंगाच्या, कफवह पांढऱ्या रंगाच्या व स्थिर रक्तवह, लाल रंगाच्या आणि अति उष्ण नाही अति शीत नाही अशा असतात.

**शिरांची कर्मे**—स्वतःच्या शिरात संचार करणारा प्राकृत वात (धातु) अडथळा न येता सर्व क्रिया व बुद्धीची कार्ये बिनचूक करतो. तोच कुपित (दोष) झाला तर स्वतःच्या शिरांमध्ये वातज रोग करतो. प्राकृत पित्त (धातु स्वतःच्या) शिरांतून सर्वत्र संचार करीत असता तेजस्विता, अन्नाला रुचि, पाचकाग्नि प्रदीप्त करणे, निरोगी शरीर ठेवणे, हे कार्य करते, तेच प्रकुपित झाल्यास पित्ताचे रोग करते. प्राकृत कफ (धातु) आपल्या शिरांतून संचार करीत असता सर्वांगात स्नेह संधींची स्थिरता, बल, देहपुष्टि करतो. व दुष्ट झाल्यास कफदोष, कफविकार करतो. आपल्या शिरात संचार करणारे विशुद्ध रक्तधातूचे (परिणाममापद्यमान) पुढील धातूंना पूरण करणे. (पुरविणे) वर्ण चांगला करणे, संशयविरहित अचूक स्पर्शज्ञान इत्यादी कार्ये करते, तेच दुष्ट रक्त रक्ताचे विकार करते. शिवाय वातादी

(धातु) आपापली इतरत्र सांगितलेली स्वाभाविक कर्मे करतात. वेध करू नये अशा शिरा— शाखेत १६ कोष्ठात ३२ डोक्यात पन्नास मिळून ४८ शिरा तोडण्यास वर्ज्य आहेत.

**–कर्मन्**–न., उपक्रम० **सिराव्यधनम्** ( चचि. २६.२०४ )
शिर तोडणे. रक्तस्राव करणें.

**–कोथ**–पु., रोग० **सिरापूतिभावः** ( सुसू. २५.३-५ )
शिरा कुजणे. शिरांची कूज.

**–क्लेद**–पु., लक्षण० **सिराणां क्लिन्नत्वम्** ( चचि. २५.३१ )
शिरा ओलसर, आर्द्र ( स्वाभाविकतेपेक्षा अधिक असणे ).

**–गत**–वि., **सिराश्रितम्, सिरास्थितम्** ( चचि. २८.३६ )
शिरेत असलेले –राहिलेले.

**–ग्रह**–पु., रोग० **अशीतिर्वातविकारेष्वेकः, वातो रक्तमाश्रित्य मूर्धधराः सिरा रूक्षाः सवेदनाः कृष्णाः कुर्यात्** ( असंनि. १५ )
ऐशी वातविकारांतील एक. वात रक्ताच्या आश्रयाने ( दुष्टीने ) डोक्याच्या शिरा रूक्ष वेदनायुक्त व काळ्या करतो.

**–ज**–पु., रोग० **ग्रन्थिः सिराजः, तल्लक्षणम्–अबलस्य व्यायामादिभिः क्रुद्धो वायुः सिराप्रतानं आक्षिप्य संपीड्य संकोच्य विशोष्य चोन्नतं वृत्तं ग्रन्थिं करोति । कृच्छ्रसाध्योऽसौ सरुजश्चलोऽरुक्च । अचलो महान् मर्मोत्थितश्च वर्जनीयः** (सुनि. ११.८९)
शिरांची गाठ. अबल मनुष्याने व्यायाम इत्यादी वातवर्धक कामे, आहार केला तर प्रकुपित वायु शिरांचे जाळे ओढतो, संकुचित करतो, दाबतो व शुष्क करून वाटोळा उंचवटा–गाठ निर्माण करतो. ही वेदनायुक्त व हालणारी असली तर कष्टाने साध्य होते व मर्मात झालेली मोठी आणि न हालणारी असाध्य असते.

**(–जा )**–स्त्री., नेत्ररोग० **सिराजपिडका, नेत्रस्य शुक्लभागे सिरावृताः सिराजपिडका भवन्ति । सन्निपातजेयं साध्या च** ( सुउ. ४.९ ) **वास्तुस्थितसिरावृतत्वात् सिराजाः नतु साक्षात् सिराजाः ।**
शिरापासून होणारी पुळी. डोळ्याच्या पांढऱ्या बुबुळावर (कवडीवर) शिरांनी वेढलेल्या श्वेतवर्णपुळ्या होतात. ह्या त्रिदोषज पण साध्य.

**–जाताञ्जना**–(परिव०)स्त्री., नेत्ररोग० **अञ्जननामिका, दाहतोदवती ताम्रा पिडका वर्त्मसंभवा । मृद्वी मन्दरुजा सूक्ष्मा ज्ञेया साञ्जननामिका** (सुउ. १.३७)
रांजणवाडी. आग व टोचणी युक्त तांबडी, मऊ, सौम्य वेदना असलेली लहान पुळी पापणीवर होते ती. मऊ, सौम्य पीडाकर, सूक्ष्म आकाराची असली तर ती अंजननामिका होय.

**–जाल**–न., **सिराकृतं सिराणां जालम्, तानि चत्वारि, एकैकस्मिन् मणिबन्धे गुल्फे च** ( चसू. १७.२१; सुशा. ५.१२ )
शिरांचे जाळे. ही चार आहेत. मनगट व घोटा यात एकेक.
नेत्ररोग० **तल्लक्षणम्–घनोन्नतं बृहद्रक्तं सिराणां जालं भवति । साध्योऽसौ** ( असंउ. १३; सुउ. १.३७ )
डोळ्यात दडस, उंचावलेले, मोठे व लाल शिरांचे जाळे होते. हा रोग साध्य आहे.

**–जालगवाक्षित**–वि., **सिराणां जालेन व्याप्तम्** ( **उदरम्** ) चचि. १३.५५ )
शिरांच्या जाळ्याने व्यापलेले. (पोट).

**–तनुत्व**–न., लक्षण० **सिराणामल्पत्वम्, सिराकार्श्यम्, उत्सेधादिभिः सिराणामदर्शनम्** ( चचि. १२.११ )
शिरा बारीक होणे, शिरा थोड्या असणे, व सुजेमुळे शिरा न दिसणे.

**–त्व**–न., **सिरास्वरूपम्** ( सुशा. ४.२९ )
शिरेचे स्वरूप.

**–दग्ध**–न., उपक्रम० **अग्निकर्मणा दग्धा सिरा कृष्णोन्नतव्रणा स्रावसंनिरोधवती च भवति।** ( सुसू. १२.८ ) **स्थिते च रक्ते लसीकास्रावः** ( असंसू ४०.६ )
शिरांना डाग. अग्निकर्माने शिरेला डाग दिला तर काळा उंच असा व्रण होतो, स्राव थांबतो व तो रक्तस्राव थांबल्यावर लसिकेचा स्राव होतो.

**–पूरण**–न., लक्षण० **सिराणां स्थूलत्वम्, सिराविस्तृतिः** ( सुनि. १. २७ )
शिरा स्थूल होणे, जाड होणे, फुगणे, ताणल्या जाणे, विस्तृत होणे.

**–पूर्णत्व**–न., लक्षण० **रक्तवहस्रोतसां रक्तेनातीव पूरणम्, अतिवृद्धरक्तस्य लक्षणेष्वेकम्** ( सुसू. १५.१४ )

शिरा टचटचित भरलेल्या असणे. रक्ताने रक्तवह-स्रोतसे फार भरलेली असणे अतिवाढलेल्या रक्ताचे लक्षण.

**-प्रहर्ष**-पु., **नेत्ररोग० सिराहर्ष** ( सुउ. ६.३० ) **सिरोत्पात उपेक्षितश्चेत् ता अक्षिराज्यो विशेषरक्तवर्णा भूत्वा ताम्राभमश्रु स्रवन्तोऽमुं सिराहर्षाख्यं नेत्ररोगं कुर्युः। तेन चक्षुःवी क्षणाक्षमं भवति** ( सुउ. ६.३० )

शिराहर्ष. डोळ्याचा रोग. सिरोत्पात रोगाची हयगय केल्याने त्या डोळ्यातील रेषा अधिक लाल होऊन लाल आसवे स्रवतात. उघडून पहाण्याला डोळा असमर्थ होतो.

**-मर्मन्**-न., **मर्मप्रकारः सिराबहुलं मर्म, मर्माण्येतानि संख्ययैकचत्वारिंशत्, चतस्रो धमन्यो नीले द्वे मन्ये द्वे, अष्टौ मातृकाः, चत्वारि शृङ्गाटकानि, द्वेऽपाङ्गे, एका स्थपनी, द्वे फणे, द्वे स्तनमूले, द्वौ अपस्तम्भौ, द्वौ अपलापौ, एकं हृदयम्, एका नाभिः, द्वौ पार्श्वसन्धी, द्वे बृहत्यौ, चत्वारि लोहिताक्षाणि, चतस्र उर्व्यश्च** ( सुशा. ६.७; असंशा. ७.२९ )

शिरा अधिक प्रमाणात असलेले मर्म. ही ४१ आहेत. धमनी ४ (नीला २+मन्या २) मातृका ८ शृंगाटके ४ अपांग २ स्थपनी १ फणा २ स्तनमूल २ अपस्तंभ २ अपलाप २ हृदय १ नाभि १ पार्श्वसंधि २ बृहती २ लोहिताक्ष ४ उर्वी ४.

**-महारुज्**-वि., **लक्षण० सिरासु महती पीडा यस्य सः** ( चसू. १३.४८ )

ज्याला शिरामध्ये मोठी पीडा होते तो.

**-मुख**-न., **सिराद्वारम्, प्रतिरोमकूपमभ्यन्तरतः सूक्ष्मं सिरामुखमस्ति। अनेन सिरा स्वेदं विमुञ्चति** ( अहसू. २७.५०; काशा. )

शिरेचे तोंड. प्रत्येक केसाच्या मुळाशी आत शिरेचे सूक्ष्म तोंड असते; यातून शिरा घाम सोडते.

**-मोक्ष**-पु., **उपक्रम० सिराव्यधः** ( चचि. ९.७७; सुउ.४२.५२-५३; सुचि.४.११; असंसू.७.२५१ )

शिरेतून रक्त काढणे, शिर तोडणे.

**-लेखा**-स्त्री., **सिराराजी** ( असंशा. ९.१८ )

शिरांची ओळ.

**-वर्णविभक्ति**-स्त्री., अध्यायसंज्ञा० ( सुशा. ७ )

एका अध्यायाचे नाव. यात शिरांची माहिति आहे.

**-विकार**-पु., **सिराणामाकारान्तरेण परिणामः, यथा धमन्यः स्रोतांसि च** ( सुशा. ९.३ )

शिरांचा बनलेला एक तसा शरिरातील पदार्थ. जसे धमनी, स्रोतस.

**-विद्ध**-वि., **यस्य सिराव्यधः कृतः सः विद्धसिरः, कृतसिराव्यधः** ( सुशा. ८.२४ )

ज्याची शीर तोडली आहे असा.

**-विमोक्षण**-न., ( परिव० ) **उपक्रम० सिराव्यधः** ( सुउ. ६२.३३ )

शिरेतून रक्त काढणे. शिर तोडणे.

**-विरेक**-पु., **उपक्रम० सिराव्यधः** ( चचि. १२.८० )

शीर तोडणे.

**-विलग्न**-वि., **सिरायां संलग्नम्** ( अहसू. २८.२६ )

शिरेत शिरलेले, शिरेशी निगडित.

**-वृत्त**-न., खनिज० **सीसकम्** ( रा. १३.२१; पृ. २१० ) शिसे.

**-वेध**-पु., ( परिव० ) **उपक्रम० सिराव्यधः** ( असंसू. ३६.९; सुचि. १९.५५ )

शिर तोडून भोक पाडून रक्तस्राव करणे; एक उपचार. पहा ' शिराव्यध. '

**-व्यध**-पु., **उपक्रम० सिराभ्यः शस्त्रकर्मणा रक्तमोक्षणम्, सिराया वेधः,**

**सिराव्यधयोग्यकालः-वर्षासु व्यभ्रे ग्रीष्मेषु शीतले काले हेमन्तेषु मध्याह्ने च सिराव्यधो विधेयः शरदादिसाधारणः कालः स्वस्थानां कृते विहितः। सिराव्यधानर्हकालः-अतिशीतेऽत्युष्णे प्रवातेऽभ्रिते सिराव्यधो न विधेयः।**

**सिराव्यधविधिः-स्निग्धस्विन्नमातुरं यथादोषप्रत्यनीकं द्रवप्रायमन्नं भुक्तवन्तं यवागूं पीतवन्तं वा यथाकालमुपस्थाप्यासीनं स्थितं वा वस्त्रपट्टादीन् यन्त्रयित्वा नातिशिथिलं नातिगाढं शरीरप्रदेशमासाद्य समुचितेन शस्त्रेण सिरां विध्येत्। व्यध्यसिरं पुरुषं प्रत्यादित्यमुखमरत्निमात्रोच्छ्रिते आसने चोपवेश्य सक्थ्नोराकुञ्चितयोः कूर्परे निवेश्य सन्धिद्वयस्योपरि हस्तावन्तर्गूढाङ्गुष्ठकृतमुष्टी मन्ययोः स्थापयित्वा ग्रीवामुष्ट्योरुपरि यन्त्रणशाटकं परिक्षिप्य पश्चात्स्थितान्यपुरुषेणोत्तानेन वामहस्तेन शाटकान्तद्वयं ग्राहयित्वा दक्षिणहस्तेन सिरोत्थापनार्थं नात्यायतशिथिलं यन्त्रमावेष्ट्यासृक्स्रावणार्थं यन्त्रं पृष्ठमध्ये पीडयेति च तमादिशेत्। कर्मपुरुषं च**

वायुपूर्णमुखं स्थापयेत् । एष उत्तमाङ्गगतानां बाह्यसिराणां व्यधने यन्त्रणविधिः पादव्यध्य-सिरस्य पादं समे स्थाने सुस्थितं स्थापयित्वाऽन्यं पादमीषत्संकुचितमुच्चैः कृत्वा व्यध्यसिरं पादं जानुसन्धेरधः शाटकेनावेष्ट्य हस्ताभ्यां प्रपीड्य गुल्फं, व्यध्यप्रदेशस्योपरि चतुरङ्गुले प्लोतादिना बध्द्वा वा पादसिरां विध्येत् । उपरिष्टाद्धस्तौ गूढाङ्गुष्ठकृतमुष्टी सम्यगासने स्थापयित्वा सुखोपविष्टस्य पूर्ववद्यन्त्रं बध्द्वा हस्तसिरां विध्येत् । गृध्रसी विश्वाच्योः संकुचितजानुकूर्परस्य श्रोणीपृष्ठस्कन्धेषून्नामितपृष्ठस्यावाक्शिरस्कस्योपविष्टस्य विस्फूर्जितपृष्ठस्य सिरां विध्येत्। उदरोरसोः प्रसारितोरस्कस्योन्नामितशिरस्कस्य विस्फूर्जितदेहस्य, पार्श्वयोर्बाहुभ्यामवलम्बमानदेहस्य, मेढ्रेऽनामितमेढ्रस्य, अधोजिह्वायामुन्नमितविदष्टजिह्वाग्रस्य, तालुनि दन्तमूलेषु चातिव्यात्ताननस्य, एवं यन्त्रोपायानन्यांश्च सिरोत्थापनहेतून् बुद्ध्याऽवेक्ष्य शरीरवशेन व्याधिवशेन च विदध्यात् (सुशा. ८.८; असंसू. ३६.११) व्याधिवशात् सिराव्यधस्थानानि—कफोदरे वामे बाहौ सिराव्यधः ( चचि. १३.७७ ) रक्तजदाहेऽप्रशाम्यति सति शाखाश्रितरोहिणीसिराणां व्यधः ( सुउ. ४७.६९ ) यकृद्दाल्युदरे दक्षिणबाहौ सिराव्यधः ( सुचि. १४.१५ ) पाददाहपादहर्षचिप्पविसर्पादिषु क्षिप्रमर्मण उपरिष्टाद् द्व्यङ्गुले, श्लीपदे—वातजे गुल्फोपरि चतुरङ्गुले, पित्तजे गुल्फाधः, कफजे चाङ्गुष्ठे ( सुचि. १९.५२-५६ ) क्रोष्टुकशिरः-खञ्जपङ्गुलवातवेदनासु जङ्घायां गुल्फस्योपरि चतुरङ्गुले, अपच्यामिन्द्रबस्तेरधस्ताद् द्व्यङ्गुले, गृध्रस्यां जानुसन्धेरुपर्यधो वा चतुरङ्गुले, गलगण्डे ऊरुमूलसंश्रिताम्, एवमेवेतरसक्थिबाहुषु सिराव्यधः, प्लीहोदरे वामबाह्वभ्यन्तरतो बाहुमध्ये कनिष्ठिकानामिकयोर्मध्ये वा, एवं यकृद्दाल्ये दक्षिणबाहौ, कासश्वासयोरप्येनाम्, शूलिन्यां प्रवाहिकायां श्रोण्योः समन्ताद् द्व्यङ्गुले, परिवर्तिकोपदंशशूकदोषशुक्रव्यापत्सु मेढ्रमध्ये (सुचि. १९.२५) मूत्रवृद्धयां वृषणयोः पार्श्वे, दकोदरे नाभेरधश्चतुरङ्गुले सेवन्या वामपार्श्वे, अन्तर्विद्रधौ पार्श्वशूले च वामपार्श्वे कक्षास्तनयोरन्तरे, बाहुशोषावबाहुकयोरंसयोरन्तरे, तृतीयके त्रिकसन्धिमध्यगताम्, चतुर्थके अधःस्कन्धसन्धिगतामन्यतरपार्श्वसंस्थिताम्, अपस्मारे हनुसन्धिमध्यगताम्, उन्मादे शङ्खकेशान्तसन्धिगतामुरोपाङ्गललाटेषु ( चनि. ७.८ ) दन्तव्याधिषु जिह्वारोगेषु चाधोजिह्वायाम्, तालव्येषु तालुनि कर्णशूले कर्णरोगेषु च कर्णयोरुपरि समन्तात्, गन्धाग्रहणे नासारोगेषु च नासाग्रे, तिमिराक्षिपाकप्रभृतिषु नेत्ररोगेषूपनासिके लालाव्यामपाङ्गां वा, मन्थप्रभृतिषु शिरोरोगेष्वेता एव सिरा वेध्याः । ( सुशा. ८.१७; असंसू. ३६.९ ) सिरामोक्षणे रक्तप्रमाणम्—बलिनो बहुदोषस्य वयःस्थस्य प्रस्थमात्रं नाम सार्धत्रयोदशपलानि रक्तं हरेत् । सिराव्यधसम्यग्योगातियोगादयः—सम्यग्विद्धा सिरा धारां स्रवेत्, यन्त्रे मुक्ते सति तस्याः स्रावरोधश्च भवति ( सुशा. ८.११ ) अतिविद्धा सशब्दं वहति, तत्स्रावश्च दुःखधारणो भवति । दुर्विद्धाऽल्पकालं वहति, तैलयुक्तैश्चूर्णैश्च स्रवेत्

( असंसू. ३६.१४-१५; अहसू. २७.३५ ) सिराविद्धवर्ज्यानि—क्रोधायासमैथुनदिवास्वप्नवाग्व्यायामयानाध्ययनस्थानासनचङ्क्रमणशीतवातातपविरुद्धासात्म्याजीर्णान्याबललाभाद्; मासं यावद्वा ( सुशा. ८.२४ ) सिराविद्धसेव्यानि—नात्युष्णशीतं लघु दीपनीयमन्नपानं हितम्। जठराग्निरक्षणं च हितम् ( अहसू. २७.५२ ) सिराव्यधयोग्याः—त्वग्दोषग्रन्थिशोफादिशोणितावसेकसाध्याविकारास्तथा चान्येऽनुक्ता अपक्वा विकारा यथाभ्यासं यथान्यायं च सिराव्यधयोग्याः जायन्ते (सुसू. १४.३४; सुशा. ८.४) विषोपसर्गे चात्ययिके च सिराव्यधोऽप्रतिषिद्धः (सुशा. ८.५) सिराव्यधायोग्याः— बालस्थविररूक्षक्षतक्षीणभीरुपरिश्रान्तमद्यपाध्वस्त्रीकर्शितवमितविरिक्तास्थापितानुवासितजागरितक्लीबकृशगर्भिण्यः कासश्वासशोषप्रवृद्धज्वराक्षेपकपक्षाघातोपवासपिपासामूर्च्छाप्रपीडिताश्च सिराव्यधायोग्याः । तथा चाव्यध्याः, व्यध्या अप्यदृष्टाः, दृष्टा अप्ययन्त्रिताः, यन्त्रिता अप्यनुत्थिताः सिरा व्यधायोग्याः द्रष्टव्याः ( सुशा.८.३ ) अव्यध्याः सिराः— शाखासु षोडश, कोष्ठे द्वात्रिंशद् जत्रुणश्चोर्ध्वं पञ्चाशत् सिरा अव्यध्याः । तत्र प्रतिशाखं सक्थ्नि जालधरैका, उर्वीसंज्ञे द्वे, लोहिताक्षा चैका, एवं शाखासु षोडश । कोष्ठे, श्रोण्यामष्टौ, द्वे द्वे विटपयोः कटीकतरुणयोश्च, पार्श्वे द्वे ऊर्ध्वगे

पार्श्वसन्धिगते; पृष्ठे चतस्र ऊर्ध्वगामिन्यौ द्वे द्वे बृहतीसिरे; उदरे चतस्रो मेढ्रोपरि रोमराजीमुभयतो द्वे द्वे; वक्षसि चतुर्दश हृदये द्वे, द्वे द्वे स्तनमूले, स्तनरोहितापलापस्तम्भेषूभयतोऽष्टौ; एवं कोष्ठे द्वात्रिंशत् । जत्रुण ऊर्ध्वम्, ग्रीवायां षोडश, द्वादश मर्मसंज्ञा अष्टौ मातृका द्वे नीले द्वे मन्ये द्वे, कृकाटिकयोर्द्वे विधुरयोः; हन्वोरुभयतश्चतस्रः सन्धिधमन्यौ द्वे द्वे; जिह्वायां चतस्रो रसवहे द्वे वाग्वहे च द्वे, नासिकायां चतस्र औपनासिक्यः, तालुन्येका नेत्रयोर्द्वेऽपाङ्गयोः कर्णयोर्द्वे शब्दवाहिन्यौ; ललाटे सप्त केशान्तानुगतांश्चतस्रः, आवर्तयोर्द्वे, स्थपन्यां चैका; शङ्खयोर्द्वे शङ्खसन्धिगते; मूर्ध्नि चाष्टौ, द्वे उत्क्षेपयोः, पञ्च सीमन्तेषु, एका चाधिपतौ; एवं जत्रुण ऊर्ध्वं पञ्चाशत् ।

सिराव्यधव्यापदः--दुर्व्यधातिव्यधकुट्टिततिर्यग्व्यधाश्चत्वारो व्यधदोषाः ( असंसू. ३६.२२ ) दुष्टव्यधा विंशतिः--दुर्विद्धाऽतिविद्धा कुञ्चिता पिच्चिता कुट्टिताऽप्रसुताऽत्युदीर्णाऽन्ते विद्धा परिशुष्का कूणिता वेपिताऽनुत्थितविद्धा शस्त्रहता तिर्यग्विद्धाऽविद्धाऽव्यध्या विद्रुता धेनुका पुनःपुनर्विद्धा सिरास्नाय्वस्थिसन्धिमर्मसु विद्धा चेति । तत्र या सूक्ष्मशस्त्रविद्धाऽव्यक्तमसृक् स्रवति रुजाशोफवती च सा दुर्विद्धा, प्रमाणातिरिक्तविद्धायामन्तः प्रविशति शोणितं, शोणितातिप्रवृत्तिर्वा भवति, साऽतिविद्धा, कुञ्चितायामप्येवं, कुण्ठशस्त्रप्रमथिता पृथुलीभावमापन्ना पिच्चिता, अनासादिता पुनःपुनरन्तयोश्च बहुशः शस्त्राभिहता कुट्टिता, शीतभयमूर्च्छाभिरप्रवृत्तशोणिताऽप्रसृता, तीक्ष्णमहामुखशस्त्रविद्धाऽत्युदीर्णा अल्परक्त स्राविण्यन्ते विद्धा, क्षीणशोणितस्थानिलपूर्णा परिशुष्का, चतुर्भागासादिता किञ्चित्प्रवृत्तशोणिता कूणिता, दुःस्थानबन्धनाद्वेपमानायाः शोणितसंमोहो भवति सा वेपिता, अनुत्थितविद्धायामप्येवं, छिन्नाऽतिप्रवृत्तशोणिता क्रियासङ्गकरी शस्त्रहता, तिर्यक्प्रणिहितशस्त्रा किञ्चिच्छेषा तिर्यग्विद्धा बहुशः क्षता हीनशस्त्रप्रणिधानेनाविद्धा, अशस्त्रकृत्याऽव्यध्या, अनवस्थितविद्धा विद्रुता, प्रदेशस्य बहुशोऽवघट्टनादारोहद्व्यधा मुहुर्मुहुः शोणितस्रावा धेनुका, सूक्ष्मशस्त्रव्यधनाद्बहुशो भिन्ना पुनः पुनर्विद्धा, स्नाय्वस्थिसिरासन्धिमर्मसु विद्धा रुजां शोफं वैकल्यं मरणं चापादयति ( सुशा. ८.१८-१९ )

**सिराव्यधप्रशस्तिः** - शल्यतन्त्रे सिराव्यधश्चिकित्सार्धं मतः । स्नेहादिक्रियायोगैर्लेपनादिभिश्चाशान्ता व्याधयोऽनेन शाम्यन्ति (सुशा. ८.२२-२३) **रक्तमोक्षणशीलानां त्वग्दोषग्रन्थिशोफाः शोणितजव्याधयश्च न भवन्ति** ( सुसू. १४.३४ )

शीर तोडून, भोक पाडून रक्तस्राव करणे. शिरेचा वेध. **योग्य काल**—वर्षाऋतूत आभाळ नसताना, ग्रीष्मऋतूत थंड वेळी, हेमंतात ( थंडीत ) दुपारी बारा वाजता, शरद्ऋतू इत्यादी साधारण ( फार उष्ण वा थंड नसलेला ) निरोगी व्यक्तींना चांगला. **अयोग्य काल**—अतिशय थंडीत कडक उन्हाळ्यात, वादळी हवेत, आभाळ असताना शीर तोडू नये. **विधि**—तूप इत्यादी पाजून, स्निग्ध करून, घाम काढून, असलेल्या प्रकुपित दोषांच्या विपरीत गुणाचे पातळ अन्न किंवा पेज देऊन, योग्य वेळी बसवून, वस्त्राच्या पट्टयाने शिरेच्या वर अतिघट्ट किंवा ढिले नाही असे बांधून योग्य शस्त्राने शीर तोडावी. हातभर उंचीचे बसण्याचे आसन असावे, सूर्याकडे तोंड करावे. मांड्या आकुंचित करून, त्यावर दोन्ही कोपरे टेकून, त्यांच्या सांध्याच्या वर आंगठे आत घेऊन, वळलेल्या मुठी मानेच्या दोन्ही बाजूला असलेल्या मन्या शिरांच्या वर ठेवून, मान आणि दोन्ही मुठींच्या वर वस्त्र टाकून मागे उभ्या असलेल्या दुसऱ्या पुरुषाकडून आपल्या डाव्या हाताला उताणा करून त्या वस्त्राची दोन्ही टोके धरवावी आणि "उजव्या हाताने मागच्या बाजूला ते वस्त्र फार घट्ट किंवा सैल होणार नाही असे आवळ." असे त्याला वैद्याने सांगावे. या वेळी त्या रोग्याने आपल्या तोंडात वारा धरून ते फुगवलेले ठेवावे. याप्रमाणे डोक्याकडील बाह्य शिरांचा वेध करण्याची ही पूर्वतयारी झाली. ही ढोबळ रीती सांगितली. शरिराचा अवयवविशेष, रोग यांना अनुसरून शीर कशी फुगलेली स्पष्ट वर आलेली मिळेल हे पाहून बुद्धीने बंध इत्यादी उपाय करावे. **व्याधीला अनुसरून शिरांचा वेध करण्याची स्थाने**—कफोदरात डाव्या हाताची शीर, रक्तज दाहात तो कमी होत नसला तर शाखेतील रोहिणी शीर, यकृतोदरात उजव्या हाताची, पायाचा दाह, स्फुरण, नखुरडे, धावरे इत्यादींमध्ये व क्षिप्रमर्माच्या वर दोन अंगुळा वरची. वातज हत्ती-

रोगात घोट्याच्या वर चार अंगुळे, पित्तजावर खाली, व कफजावर आंगठ्याची शीर. गुडघी, डोके, लंगडा पांगळा यांच्या वेदनात, जांघेत घोट्याच्या वर चार अंगुळावर. अपची, गंडमालात, पायाच्या पिंढरीत, टाचेच्या बाजूला दोन अंगुळावर; गृध्रसीत गुडघ्याच्या वर किंवा खाली चार अंगुळावर; गलगंडात मांडीच्या आरंभीच्या भागातली. याचप्रमाणे दुसरी मांडी व बाहूतली शीर जरुरीप्रमाणे चालेल. प्लीहोदरात डाव्या बाहूच्या आंतल्या बाजूची बाहूमधली, किंवा शेवटच्या लहान करंगळ्यामधील. यकृतोदरात या प्रमाणेच उजव्या बाहूमधील. श्वास व खोकल्यात याप्रमाणेच. पोटात शूल व प्रवाहिका यांमध्ये कंबरेच्या बाजूच्या दोन अंगुळांवर. लिंगाचा परिवर्तिक उपदंश, लिंग मोठे करण्याच्या उपचारांनी झालेला शूकदोष, शुक्रदोष यात लिंगातील शीर. मूत्रवृद्धीत बृषणाच्या बाजूची शीर. जलोदरात नाभीच्या खाली शिवनीच्या डाव्या बाजूला चार अंगुळावर. पार्श्वशूल व अंतर्विद्रधीत डाव्या बाजूच्या काख व स्तन यामधील. बाहुशोष व अवबाहुक यात दोन्ही अंसफलकामध्ये. तिजाऱ्यात त्रिकसंधीतली. चौथाऱ्यात खांद्याच्या संधीतील कोणत्याही एका बाजूची. अपस्मारात हनुवटीच्या संधीमध्ये. उन्मादात शंख व केसांची रेषा यांच्या संधीवरील किंवा डोळ्याच्या बाहेरच्या कोपराजवळच्या भागातील, छाती व कपाळ यावरील; दात व जीभ यांच्या रोगात जिभेच्या खालची. टाळूच्या रोगात टाळूतली. कानातले रोग, शूळ यात कानाच्या वर भोवतालची. वास येत नसेल तर व नाकाच्या रोगात नाकाच्या टोकावरील. डोळा पिकणे व दृष्टिरोग इत्यादीमध्ये नाकाजवळची, कपाळावरची किंवा डोळ्याच्या बाहेरच्या सांध्याजवळची. डोळ्याचे मंथ व इतर रोग तसेच डोक्याच्या रोगात याच शिरा वेधाव्या.

**रक्त काढण्याचे प्रमाण**— बलवान, पुष्कळ दोष असलेला, वयाच्या मानाने अनुरूप असलेल्या रोग्याचे ५४ तोळे रक्त काढावे.

**शीर योग्य किंवा अयोग्य कापली गेल्याची लक्षणे**— योग्य कापली गेली तर रक्ताची धार स्रवते व यंत्र काढून घेतले की रक्तस्राव थांबतो. अतिशय कापली गेली की रक्त वाहताना शब्द होतो व तो स्राव थांबवण्यास कठीण जातो. व चांगली कापली गेली नाही तर थोडा वेळ रक्त स्रवते, तेलयुक्त चूर्ण लावले तर पुन्हा स्रवते.

**शीरेतून रक्तस्राव केल्यावर वर्ज्य करावयाची कर्मे व पदार्थ**— राग, श्रम, संभोग, दिवसा झोप, अधिक बोलणे, व्यायाम, प्रवास, अध्ययन, उभे राहणे, बसणे, चालणे, थंडी- ऊन विरुद्ध, विनसवयीचे अन्नादि अजीर्ण ही शक्ति भरून येईपर्यंत किंवा महिनाभर वर्ज्य करावीत.

**रक्त शिरेतून काढल्यानंतर सेवनीय**— फार थंड किंवा उष्ण नाही असे हलके, दीपक अन्नपान हितकर. जाठराग्नीचे रक्षण करावे.

**शीर कोणाची तोडावी**— त्वचेचे रोग, गाठी, सूज, रक्त काढल्याने साध्य होणारे रोग, तसेच दुसरे न सांगितलेले आमविकार झाले, विषबाधा झाली तर व अतितीव्र विकार असताना शीर तोडणे निषिद्ध नाही.

**शीर तोडण्यास अयोग्य**— बाल, वृद्ध, रूक्ष, उरःक्षती, क्षीण, भित्रा, थकलेला, मद्यपी, मार्ग व स्त्रीसंभोगाने क्षीण, वांती-रेच झालेला, निरुह-अनुवासन बस्ति घेतलेला, जागरण झालेला, नपुंसक, कृश, गर्भिणी. खोकला-श्वास-क्षय-वाढलेला ज्वर-आचके-अर्धांगवात-उपवास-तहान व मूर्च्छा यांनी पीडलेला; ज्यांची शीर तोडावयाची त्यांची शीर दिसत नसेल, दिसली तरी नियंत्रित होत नसेल, नियंत्रित झाली तरी वर फुगून आली नसेल तर ती तोडू नये.

**तोडण्यास अयोग्य शिरा**— शाखेत १६ कोष्ठात ३२ व मान, डोके यात ५० अयोग्य. **प्रत्येक शाखेत**— एक जलधारा, दोन उर्वी, एक लोहिताक्षा अशा चार ही शाखात मिळून सोळा वर्ज्य. **कोष्ठात**—कंबर, ओटीपोट यात ८, वृषण ते गुदापर्यंत व पाठीमागे हाडावरील दोन दोन, बाजूच्या कुशीवरच्या संधीत दोन दोन.

**पाठीत**— चार-वर जाणाऱ्या दोन दोन बृहती नावाच्या शिरा. **उदरातल्या**— चार-लिंगावरच्या केसाच्या बाजूच्या दोन दोन. **छातीत**— चौदा-हृदयाजवळच्या दोन, स्तनमूळातल्या स्तनरोहित - अपलाप - स्तंभ यातल्या आठ. अशा कोष्ठातल्या ३२.

**जत्रूच्या वर—** मानेत १६; बारा मर्म असलेल्या आठ मातृका, दोन नीला, दोन मन्या, दोन कृकाटिकेतल्या, दोन विधुर मर्मांतल्या, हनुवटीच्या दोन्ही बाजूच्या चार (संधी धमनी दोन दोन) जिव्हेत चार—रसवह दोन, वाग्वह दोन. नाकाजवळच्या चार—टाळूत एक, डोळ्याच्या बाहेरच्या सांध्या जवळच्या दोन, कानातल्या दोन शब्दवाहिनी, कपाळावरच्या सात, केसांच्याकडे जवळच्या चार, भोवऱ्यातल्या दोन, स्थपनीत एक, शंखात (कानशीळ) शंखाच्या संधीत दोन, डोक्यात आठ, उत्क्षेपात दोन, सीमंतावरच्या पाच अधिपतीवरची एक. अशा जत्रूच्या वरच्या पन्नास.

**शीर तोडण्यात चूक झाली तर त्याचे प्रकार**—चार. तिरकी तोडणे, अती प्रमाणात तोडणे, वाईट रीतीने तोडणे व ठेचली जाणे. वाईट रीतीने तोडण्याचे वरचे वीस प्रकार आहेत. सूक्ष्मशस्त्राने तोडली तर रक्त थोडे स्रवते वेदना व सूज येते. अती प्रमाणात जर शीर तोडली गेली तर रक्त आत स्रवते, किंवा रक्तस्राव बाहेर फार होतो.

कुट्टिता—पुनः पुनः तोडली किंवा पिच्चित—पिचली गेली तर स्नायु, मांस अधिक ठेचले जाते म्हणून वेदना होतात व सूज येते. स्नायु, अस्थि, शीर यांच्या संधीवर व मर्मात छेदली तर वेदना, सूज, विकलता किंवा मरणही ओढवते.

**—व्यधविधि**—पु., अध्यायसंज्ञा० ( असंसू. ३६.१, अहसू.२७ )
अध्यायाचे नाव. यात शिरा तोडण्याची माहिती आहे.

**—व्यधविधिशारीर**—न., अध्यायसंज्ञा० (सुशा. ८)
अध्यायाचे नाव. यात शिरा तोडण्याची माहिती आहे.

**—शुक्र**—न., नेत्ररोग० तल्लक्षणम्—**सास्त्रैर्मलैर्जुष्टं कृष्णमण्डलं सतोददाहताम्राभिः सिराभिरवतन्यते** (सुउ. ५.६) **तच्चानिमित्तोष्णशीताच्छघनाश्रुस्रुदसाध्यम्** ( असंउ. १३ ) **तथा मध्ये छिद्रयुक्तमिव वर्तमानम्, अच्छिन्नमध्यमेवोन्नतमांसेन वेष्टितं चासाध्यम्** (सुउ.५.६)
नेत्ररोग—रक्तासह तीनही दोषांच्या दुष्टीने डोळ्यातील कृष्णमंडलात टोचणी दाह उत्पन्न होऊन लाल शिरानी तो भाग व्याप्त होतो. त्यातून थंड किंवा उष्ण असे काहीही कारण नसता स्वच्छ अश्रूचा स्राव होतो. हा विकार असाध्य. त्याचप्रमाणे मध्ये छिद्र पडल्यासारखे असून नसलेला भाग आत मांस उचलून येऊन त्याने वेष्टिले जाते.

**—संकोच**—पु., लक्षण० **सिराणामाकुञ्चनम्** ( चसू. ५.९२ )
शिरा आकुंचित होणे, शिरांचे आकुंचन.

**—संकोचन**—न., लक्षण० **नाडीनामाकुञ्चनम्** ( चवि. २.७ )
शिरांचे आकुंचन.

**—संज्ञपिटिका**—स्त्री., नेत्ररोग० **सिराजपिटिका** ( असंउ. १३ )
शिरांपासून झालेली पुळी. शिरा नावाची पुळी.

**—सन्ततगात्र**—वि., लक्षण० **धमनीजालसन्ततः** ( ड. सुनि. २.१५ )
ज्याच्या अवयवावर शिराचे जाळे पसरलेले आहे, असा.

**—स्तम्भ**—पु., लक्षण० **व्रणोपद्रवभूतं सिराणां स्तब्धत्वम्** ( चचि. २५.२९ )
व्रणाचा उपद्रव. शिरा ताठरणे, स्तब्ध होणे.

**—स्फुटत्व**—न., **सिराणां विवृतत्वम्** ( सुशा. २.४५ )
शिरा विस्तृत होणे.

**—हर्ष**—पु., नेत्ररोग० **सिराप्रहर्षः** ( असंउ. १३ ) **सिरोत्पात उपेक्षितश्चेत् ता एव राजीर्वर्धयन् साश्रुं सिराहर्षाख्यं नेत्ररोगं कुर्यात्। तेन चक्षुरुद्वीक्षणाक्षमं भवति** ( सुउ. ६.३०; असंउ. १३ )
नेत्ररोग—सिरोत्पात ह्या नेत्ररोगाची उपेक्षा केली तर तेथील त्याच शिरांच्या रेषा अधिक वाढून हा रोग होतो. यात त्या शिरा चमकणे व सारखा अश्रुस्राव होतो. त्यामुळे डोळे उघडून पहाणेही जड जाते.

**सिराकुञ्चन**—न., लक्षण० **सिराकुटिलता, सिरायाः कौटिल्यम्** ( सुनि. १.२७ )
शीर आकुंचित होणे.

**सिरादिदाह**—पु., **मधुस्नेहादिभिः सिरादीनां दहनम्** ( असंसू. ४०.३; अहसू. ३०.४४ )
कढत मध, स्नेह इत्यादींनी शिरांना डाग देणे, शीर जाळणे.

**सिरानद्ध**—वि., लक्षण० **सिराभिः समन्ततो व्याप्तम्** ( असंशा. ११.२१ )
शिरांनी सभोवार व्यापलेले. भोवताली शिरांचे जाळे असलेले.

**सिरामय**–पु., सिरारोगः ( चचि. २९.३९ )
शिरांचा रोग.

**सिरायाम**–पु., **लक्षण० सिरास्वायाम इव पीडा** ( चचि. २३.१६७ ) **सिराकर्षणम्** ( इन्दु. असंउ. ४३ )
शिरांना ओढ. शिरा ओढल्याप्रमाणे, खेचल्याप्रमाणे वेदना होणे.
**सिराप्रसरणम्** ( चचि. १२.१० ) शिरा पसरणे.
**सिराकर्षणम्** ( इन्दु. असंउ. ४३ ) शिरांचे आकर्षण.

**सिरास्र**–न., **सिरागतं रक्तम्** ( असंनि. ३.१७ )
शिरेतील रक्त.

**सिरोत्थापन**–न., **सिराणामुन्नामनम्** ( सुशा. ८.८ )
शीर उचलून येणे, शीर फुगणे.

**सिरोत्पात**–पु., **नेत्ररोग० शोणितजोऽयम्** ( असंउ. १३ ) **तल्लक्षणम्–अक्षिराज्यः सवेदना अवेदना वापि ताम्रा भवन्ति । मुहुर्विरज्यन्ति च** ( सुउ. ६.२९ ) **नेत्रशुक्लभागेऽयं भवति; तत्र शोफाश्रूपदेहाश्च न सन्ति** ( असंउ. १३ )
डोळ्याचा एक रोग, रक्तज विकार. डोळ्याच्या शिरांच्या ओळी वेदनायुक्त किंवा वेदनाविरहित असतात. काही वेळ फार लाल होतात. डोळ्याच्या पांढऱ्या भागात सूज आसू व मळ येणे हा त्रास होत नाही.

**सिह्लक**–पु., **धूप० तुरुष्कः** ( ध. ३.२२; पृ. ९८ )
ऊद, धूप.

**सिह्लसार**–पु., **धूप० तुरुष्कः** ( रा. १२.३६; पृ. ९८ )
ऊद, धूप.

**सीदन्ती**–वि., **श्राम्यन्ती; श्रान्ता, अचेष्टमाना** ( अहृसू. २६.३९ )
गळालेली, गाठाळलेली, थकलेली, हालचाल न करणारी.

**सीधु**–पु., **आसुत०** ( चसू. १५.७ ) **द्रवद्रव्योभयप्रधानं मद्यम्** ( सुसू. ४५.१९७ ) **इक्षुरसेन क्वथितेन धातक्यादिबद्धपाशः कालान्तरेण निष्पन्नः किञ्चिद्गुडघृतावापः सस्यकः** ( ड. ) **सीधुगुणाः– कषायो मधुरः पाचनो दीपनश्च** ( सुसू. ४५.१८२ ) **वातपित्तकरः स्नेहश्लेष्मविकारनुन्मेदःशोफोदरार्शोघ्नश्च** ( अहृसू. ५.७४ ) **पक्करसःसीधुगुणाः–बलवर्णकरः सरः शोफघ्नो दीपनो हृद्यो रुच्यः श्लेष्मार्शसां हितश्च** ( सुसू. ४५.१८४ ) **अयं नेत्ररोगेषु सेकार्थमुपयुज्यते** ( असंउ. १९ )
द्रव व इतर द्रव्ये दोन्ही द्रव्ये ज्यात मुख्य आहेत असे मद्य. उसाचा रस कढवून धायटी इत्यादी घालून ठेवला की काही काळाने होणारे. यात थोडा गूळ व तूप घातले की याला सस्यक म्हणतात. **गुण**–तुरट, गोड, दीपक, पाचक, वातपित्तकर, स्नेहापासून झालेले विकार आणि कफविकार मेदाचे तसेच सूज, उदर, मूळव्याध नाशक. शिजवलेल्या रसाच्या सीधूचे **गुण**–बलवर्ण करणारे, सारक, सूजनाशक, दीपक, रुचकर, हृदयाला हितकर, कफजमूळव्याध नाशक. डोळ्याच्या विकारावर शिंपडण्याकरिता उपयुक्त.

**–गन्ध**–पु., **वनस्पति० बकुलः** ( ध. ५.१५४; पृ. २०२ )
बकुळ.

**–रस**–पु., **वनस्पति० आम्रः** ( रा. ११.२, पृ. १७० )
आंबा.

**सीमन्त**–पु., **केशमार्गः** ( चइ. ८.६; सुसू. ३१.१० )
भांग.
**चतुर्दश सीमन्ताः, गुल्फजानुवङ्क्षणेषु त्रयः, एवं सक्थिबाहुषु च मिलित्वा चतुर्भिस्त्रिकैर्द्वादश, त्रिके एकः, एकश्च शिरसीत्येवं चतुर्दश** ( सुशा. ५.१६-१७ ) **अष्टादशेति केचित्, तत्र पूर्वोक्ताश्चतुर्दश, श्रोणिकाण्डोपर्येकः, वक्षउपर्येकः, उदरोरःसंधाने एकः, अंसकूटोपर्येकश्च** ( ड. सुशा. ५.१७ ) **वृद्धवाग्भटे गुल्फजानुवङ्क्षणमणिबन्धकूर्परकक्षास्वेकैकः, त्रिके एकः, पञ्च शिरसीत्यष्टादश** ( इन्दु. असंशा. ५.६७ )
अस्थींच्या प्रत्येक संघातातील अस्थी परस्पराशी ज्याने संबद्ध झाले आहेत–शिवले आहेत तो सीमंत. हे चौदा आहेत. घोटा, गुडघा व जांघ यात तीन असे दोन्हीकडील हात व पाय यातील एकंदर बारा, माकडहाडात एक व डोक्यात एक; असे सर्व मिळून चौदा. एक मत–१८. वरील चौदा अधिक कंबरेच्या वर एक, उराच्या वर एक, उदर व छातीच्या सांध्यात एक, व अंसकूटाच्या वर एक, असे अठरा. वृद्धवाग्भट-मताने घोटा, गुडघा, जांघ, मनगट, कोपर व काख प्रत्येकी दोन असे बारा; त्रिकातील एक आणि डोळ्यात पाच असे अठरा.
**विच्छेदः** ( हे. अहृसू. ७.६ ) भांग पाडणे.
**मर्म० शीर्षसन्धिः** ( सुशा. ६.२७ ) **इदं स्थानतः शिरोमर्म**, जातितः **सन्धिमर्म; मानतश्चतुरङ्गुल-**

प्रमाणं, संख्यया पञ्च, कालान्तरप्राणहरं च ( ड. सुशा. ६·२७; असंशा. ७.२४ ) तत्रोन्माद-भयचित्तनाशैर्मरणम् ( सुशा. ६.२७ )

एक मर्म. डोक्याचे संधि; स्थानाच्या दृष्टीने शिरोमर्म, प्रकार दृष्टीने संधिमर्म; प्रमाण चार अंगुळे; संख्या पाच; सात दिवसात उन्माद, भय, चित्तनाश यांनी मरण.

**सीमन्तक**–पु., मर्यादारेखा ( असंसू. ८.११ )

मर्यादादर्शक रेषा.

**सीमन्तावर्तक**–पु., रिष्टलक्षण० चक्राकारा केशभूमिः ( असंशा. ९.२२ )

केसांचा भोवरा. मरण्याचे दर्शक चिन्ह.

न., भैषज० सिन्दूरम् ( रा. १२.१६०; पृ. ११६ )

शेंदूर.

**सीरी**–स्त्री., वनस्पति० कलिकारी ( ध. ४.९; पृ. १३५ )

कळलावी.

**सीवन**–न., शल्यतन्त्रोपक्रम० ( चसू. ११.५५ )

व्रणस्य षष्ट्युपक्रमेष्वेकः, सूच्या सूत्रेण सह व्यात्तमुखव्रणादीनां संधानम् (सुचि. १.८) व्रणसीवनविषयाः–अपाकोपद्रुता मांसस्था विवृताश्च व्रणाः ( सुचि. १.४५ ) सद्योव्रणा अभिघातजा व्रणाः, शस्त्रलिखिता मेदोजा ग्रन्थयः, कर्णयोर्लिखिता ह्रस्वाः पाल्यः, शिरोक्षिकूटनासौष्ठगण्डकर्णोरुबाहुषु जाता व्रणा ग्रीवाललाटमुष्कस्फिङ्मेढ्रपायूदरादिषु गम्भीरप्रदेशेषु मांसलप्रदेशेषु च जाता व्रणाः ( अहृसू. २९.४९-५१ )

शिवणे, शिवण्याचे कर्म. शल्यशास्त्रातील एक उपचार. व्रणाच्या साठ उपचारांपैकी एक.

व्रणाचे उघडलेले तोंड सुई दोऱ्याने शिवणे. **व्रण शिवण्यास योग्य**—जखम पिकण्याचा उपद्रव नसलेली, मांसात असलेली व तोंड मोठे असलेली जखम. आघाताने, कापण्याने झालेली ताजी जखम. खरडलेल्या मेदाच्या गाठी, कानाच्या खरडलेल्या लहान पाळी, डोके, डोळ्याची खोबण, नाक, ओठ, गाल, कान, मांडी, बाहु, तसेच मान, कपाळ, अंड, ढुंगण, लिंग, गुद, पोट, खोल भागातील व मांसल अवयवातील झालेले व्रण शिवावेत.

**( सीवनी )**–स्त्री., शारीर० प्रत्यङ्ग० सन्धिरेषा ( चचि. ३०.१७२) सप्त सीवन्यः–शिरसि विभक्ताः पञ्च, जिह्वा शेफसोश्चैकैका, ताः शस्त्रेण परिहरणीयाः ( सुशा. ५.१५; असंशा. ५.६५ )

शिवण. संधीची रेषा. सात शिवणीपैकी पाच डोक्यात, जीभ व लिंग यांची एक एक यांना शस्त्राने कापू नये.

**–विकल्प**–पु., सीवनविधिः सीवनविकल्पाश्चत्वारो गोष्फणिका तुन्नसेवन्या वेल्लितकं ग्रन्थिबन्धनमिति भेदात् ( असंसू. ३८.३८ )

शिवण्याचे प्रकार–चार; गोष्फणिका, तुन्नसेवनी, वेल्लीतक आणि ग्रंथिबंधन.

**सीव्य**–न., अष्टविधशस्त्रकर्मस्वेकम्, सीवनीयम् ( सुसू. ५.५; असंसू. ३८.४१ )

आठ प्रकारच्या शस्त्रकर्मांपैकी एक. शिवणे.

वि., सीवितुं योग्यः सीवनार्हः, कर्तव्यसीवनः, ते च मेदःसमुत्था भिन्नाः सुलिखिताश्चलसन्धिव्यपाश्रिताद्या व्रणाः ( सुसू. २५.१६ )

शिवण्यास योग्य व्रण. मेदाने झालेले कापून, खरडून काढलेले, हालणाऱ्या संधीच्या आश्रयाने झालेले व्रण.

**सीस**–न., खनिज० सीसकम् (चचि. ७.८८; र. २.१०४; रा. १३.२०; पृ. २०९)

शिसे.

**–सत्त्व**–न., भैषज्य० बोद्दारशृङ्गकम् ( र. ३.१६३ )

मुर्दारशिंग.

**सीसक**–पु., भटित्रकरणकाष्ठम् ( चसू. २६.८४ )

मांस भाजण्याची काडी.

न., भैषज्य० सौवीराञ्जनम् ( चचि. १७.१२६ )

अंजन, सुरमा.

खनिज० शुद्धाशुद्धभेदेन द्विधा, तत्र शुद्धं सीसकं शीघ्रद्रावणशीलमतिगुरु छेदे कृष्णवर्णमिश्रोज्ज्वलवर्णं पूतिगन्धयुक्तं बहिर्भागे वर्णेन कृष्णं च एतद्विपरीतमशुद्धम् ( र. ५.१७८ )

तस्य शोधनम्–चुल्लीस्थे खर्परेऽग्निना सीसके द्रुते सति क्रमेण सिन्दुवारजटाकौन्त्यादिचूर्णं मुहुर्मुहुरल्पाल्पं क्षिपेत्। दर्व्या च मुहुश्चालयेत्। भस्मीभूतं तच्चूर्णमन्तराऽन्तरा तालवृन्तादिवायुनाऽपसार्य बहिः क्षिपेत्। ततस्तत् तन्निर्गुण्डीरसपूरिते सच्छिद्रमहाभारपिधानेन पिहिते चोलूखलादौ तादृशपात्रान्तरे वा दर्व्याऽन्तःक्षिपेत् तेनोत्प्लवनजबाधाभयं न स्यात्। एवं शुद्धं सीसकं मूर्च्छादिदोषकरं न भवेत् (र.५.१८० )

सीसकगुणाः– तिक्तं स्निग्धं दीपनमत्युष्णं वातकफघ्नं किञ्चित्पित्तलम् ( असंसू. १२.१६ ) प्रमेहतोयदोषघ्नमामवातनुच्च ( र. ५.१७९)

कटु कषायं लवणं लेखनं बल्यमर्शोघ्नं च (ध. ६.२१; पृ. २०९) गरकृमिहरं पिपासाविषहृद्रोगपाण्डुहृच्च (सुसू. ३८.६२)
हिं.—सीसा, सीषक.
**म.—शिसे.**
गु.—शीसूं, काळुं सिसुं.
बं—सीसा, सीसे.
त.—करुनाकं.
फा.—अनुक्रू, सुर्व.
एक खनिज द्रव्य. शिसे. शुद्ध व अशुद्ध असे दोन प्रकार. शुद्ध–लवकर वितळणारे, अतिशय जड, कापले असता काळा वर्ण मिश्र असलेला चकचकीत रंग, बाहेर काळे व दुर्गंध युक्त. याच्या उलट गुणाचे ते अशुद्ध. चुलीवर खापरात शिसे पातळ करून क्रमाने निर्गुडीमूळ, रेणुकबी, इत्यादींचे चूर्ण थोडे थोडे, थोड्या वेळाने शिश्यावर घालून पळीने ढवळावे. त्या चूर्णाचे झालेले भस्म ताडाचा पंखा इत्यादींनी वारा घालून बाहेर काढावे. नंतर निर्गुंडीचा रस असलेल्या भांड्यावर जात्याच्या तळीसारखे भोक असणारे झाकण वर ठेवून, त्याच्या भोकातून तो पातळ रस पळीने निर्गुंडीच्या रसात टाकावा. असे केल्याने त्याचे थेंब उडण्याचा त्रास होत नाही. हे शुद्ध शिसे मूर्च्छादी दोष करीत नाही. गुण–कडु, स्निग्ध, दीपक, अत्युष्ण, वातकफनाशक थोडे पित्तकर प्रमेहातील अधिक जलस्राव व आमवात नाशक. तिखट, तुरट, खारट, दोष खरडून काढणारे, मूळव्याध नाशक, बल वाढविणारे कृत्रिम विष दोष, कृमि हारक, लहान विष, हृद्रोग, पांडु नाशक.

**-कूपिक**–न., **नागधातुनिर्मिता कुपी** (र. १२-९९)
शिशाची केलेली कुपी.

**सीहुण्ड**–पु., वनस्पति० **स्नुही** (ध. १.२३५; पृ. ५५)
निवडुंग (त्रिधारी)

**सुकण्टका**–स्त्री., वनस्पति० **कुमारी** (रापरि. ५.१२; पृ. ३४०)
कोरफड.

**सुकन्द**–पु., वनस्पति० **गुण्डकन्दः** (रापरि. ८.६३; पृ. ३६२)
कशेरु कंद.
**पलाण्डुः** (ध. ४.७१; पृ. १४८) कांदा,

(**सुकन्दा**)–स्त्री., वनस्पति० **वन्ध्यकर्कोटकी** (रा. ३.२७३; पृ.४४)
वांझकर्टोली.
**लक्ष्मणा** (रापरि. ७.५५; पृ. ३५२)
पांढरी रिंगणी, लक्ष्मणा.

**सुकन्दक**–पु. वनस्पति० **मुखालुः** (रापरि. ७.२२; पृ. ३४९)
एक गोड कंद.
**धरणीकन्दः** (रापरि. ७.४२; पृ, ३५०)
धरणीकंद.
**वाराहीकन्दः** (रा. ७.१३६; पृ. १५२) डुक्करकंद.

**सुकन्दन**–पु., वनस्पति० **बर्बरः** (रापरि. १०.४८; पृ. ३७२)
एक कंद.

**सुकन्दिन्**–पु., वनस्पति० **सूरणः** (रा. ७.५; पृ. १६९)
सूरण, सूरण कंद.

**सुकन्या**–स्त्री., **शर्यातिनृपतेः कन्या, अञ्जननिर्माणविधौ इयं देवतात्वेन पूजनीया** (असंसू. ८.९४)
शर्यातिराजाची मुलगी. अंजन करण्याच्या विधीच्या वेळी हिची देवता म्हणून पूजा करावी.

**सुकर**–वि., **सुखसाध्यम्** (सुचि. ३.१५) सुखसाध्य.

**सुकर्णक**–पु., वनस्पति० **हस्तिकन्दः** (रापरि. ७.३५; पृ. ३५०)
हत्तीकंद.

**सुकर्णी**–स्त्री., वनस्पति० **आखुकर्णी** (रापरि. ३.२१; पृ. ३३१)
उंदीरकानी.

**सुका**–स्त्री., वनस्पति० **अतसी** (ध.६.११४; पृ., २३१)
आळशी.

**सुकाण्डक**–पु., वनस्पति० **काण्डीरः** (ध. ४.६२; पृ. १४६)
कांडवेल, चिरचिटा.

**सुकान्त**–न., खनिज० **कान्तलौहम्** (र. १७.६७)
कांतलोह.

**सुकामा**–स्त्री., वनस्पति० **त्रायमाणा** (रा.५.३७८;पृ.५९)
त्रायमाण.

**सुकार**–न., वनस्पति० **व्रीहिः** (रा. १६.१०७; पृ. २२२)
तांदूळ.

**सुकाष्ठक**–न., वनस्पति० देवदारु
( रा. १२.१०४; पृ. २१ )
देवदार.

**सुकाष्ठा**–स्त्री., वनस्पति० कट्वी
( रापरि. ३.४३; पृ. ३३३ )
कुटकी.
**काष्ठकदली** ( रा. ११.११०; पृ. १४९ )
रानकेळ, लाकडी केळ.

**सुकुन्द्र**–पु., वनस्पति० कुन्दुरुः
( ध. ३.१३१; पृ. १२१ )
धूपाचा एक प्रकार.

**सुकुमार**–वि., मृदुदेहः ( सुसू. ४६.४४४ )
मृदु शरिराचा, कोमल.
**देहसौकुमार्यकरम्** ( **नवनीतम्** )
( ड. सुसू. ४५.९२ )
शरिराला कोमल ठेवणारे.
**अल्पबलम्** ( **भेषजादि** ) ( चवि. ८.९४ )
थोड्या शक्तीचे. ( औषध इ० )
**वनस्पति० श्यामाकः** ( ध. ६.८८; पृ. २२५ )
सावा, वऱ्याचे तांदूळ.
**चम्पकः** ( ध. ५.१४२; रा. १०.२४०; पृ. १९९ )
चाफा.
**कङ्गुः** ( रा. १६.१४२; पृ. २२५ ) कांग.
**राजमाषः** ( रा. १६.१३५; पृ. २२४ ) चवळी.

**सुकुमारक**–पु., इक्षुभेदः, **पौण्ड्रकः**
( ध. ४.१२०; पृ. १५८ ) द्र० '**इक्षु**'
पौंड्रक नावाचा ऊस. पहा 'इक्षु.'
**वनस्पति० व्रीहिः** ( रा. १६.७८; पृ. २२० )
तांदूळ.
**न., वनस्पति० तमालपत्रम्** ( रा. ६.७९; पृ. ८० )
तमालपत्र.
–**तैल**–न., स्नेह० **मधुकद्राक्षाखर्जूरपरूषकादिसिद्धं तथा जीवनीयादिगणसंसिद्धं तैलम्, एतन्नस्याञ्जनपानेषु बस्तौ च प्रयुज्यते। चरकमहर्षिप्रणीतमिदं सर्ववातव्याधिषु प्रशस्यते। किञ्चेदं मन्यास्तम्भहनुग्रहसर्वाङ्गैकाङ्गवातक्षतक्षीणक्षतज्वरवातास्रनाशनमारोग्यबलपुष्टिदं स्वरवर्णकरं च**
( चचि. २९.९६-१०२ )
तेल. ज्येष्ठमध, द्राक्षे इत्यादी तसेच जीवनीयगणांनी सिद्ध तेल. हे नाकात नस्य म्हणून विण्यास, डोळ्यात अंजन म्हणून घालण्यास व बस्तीत उपयुक्त. सर्व वातव्याधीत उपयुक्त. मान जखडणे, हनुवटी धरणे, सर्वांग- एकांग वात, उरःक्षताने क्षीण झालेला, तसेच ताप व वातरक्त नाशक, आरोग्य, बल पुष्टिकर आणि स्वर वर्ण सुधारणारे.

**( सुकुमारा )**–स्त्री., वनस्पति० **त्रिसन्धिः**
( रापरि. १०.३७; पृ. ३७१ )
तिरसंद. तीन सांध्याच्या फुलांचे झाड.
**वनमल्लिका** ( ध. ५.४०; पृ. १९८ ) रानमोगरी.
**जाती** (रा. १०.२३१; पृ. १९८) जाई.
**कदली** ( ध. ४.७५; पृ. १४८ ) केळ.
**स्पृक्का** ( रा. १२. ११४; पृ. १०८ )
पिंडिका.

**सुकुमारोपचारता**–स्त्री., मृदुभेषजोचितत्वम्
( चवि. ८.१०६ )
सौम्य औषधे सहन होणे.

**सुकूर्च**–पु. न., सुष्ठुतमः कूर्चः, यस्मिन् यस्य वा तद् ( **दन्त धावनम्** ) असंसू. ३.१५ )
फारच चांगली कुंचली. दात घासण्याची काडी.

**सुकोशक**–पु., वनस्पति० **कोशाम्रः** ( ध. ५.९; पृ. १७० )
रानआंबा, जंगली आंबा.

**सुकोशा**–स्त्री., वनस्पति० **कोशातकी** ( रा. ७.२८८; पृ. ४६ )
दोडके, घोसाळे.

**सुक्त**–न., काञ्जीभेदः ( चसू. २४.७; अहसू. २८.४२)
कांजीचा प्रकार.

**सुक्षेत्र**–वि., शोभनशरीरःडल्हणोक्तदशक्षेत्रविषमकोत्तरोत्तरशोभनत्ववान् ( सुसू. ३५.५; असंशा. ८.३३ )
सुंदर शरिराचा.

**सुख**–वि., व्यापद्रहितम् ( अहसू. १९.६९ )
सुखकर, अनिष्ट परिणाम रहित.
**स्वास्थ्योत्पादकम्** ( सुसू. ४६.४३७ )
आरोग्यदायक, आरोग्य उत्पन्न करणारे.
न., **अनुकूलवेदनीयम्** ( चवि. ८.३९; सुशा. १.१७ ) **यदाल्हादं जनयति तत्, आत्यन्तिकतादात्विकभेदेन सुखं द्विविधम्। तत्रात्यन्तिकं सुखं मोक्षः, तादात्विकं कामादिश्च** ( अरु. अहसू. १.२)

शरीर व मन यांना अनुकूल संवेदनादायक. जे आल्हाददायक ते सुख. त्याचे प्रकार दोन. ( १ ) आत्यंतिक सुख, मोक्ष. ( २ ) काही काल टिकणारे. कार्यसिद्धि, यश, इच्छित प्राप्ती इत्यादींनी मिळणारे.
**आरोग्यम्** ( चसू. १.५५ ) आरोग्य.
**वनस्पति० ऋद्धिः** ( ध. १.१४५; पृ. ३४ )
अष्टवर्गांतील एक.

**–दा**–स्त्री., **वनस्पति० शमी** ( रा. ८.१५३; पृ. १८८ )
शमी.

**–पक्ति**–स्त्री., **सुखेन पाकः** ( अहसू. १६.२३ )
सुखाने पचन होणे ( अन्न ) इ०.

**–भोजिन्**–पु., **वनस्पति० व्रीहिः** ( रा. १६.११४; पृ. २२२ )
तांदळाचा एक प्रकार.

**–रोपणीय**–वि., **यस्य सुखेन रोपणं भवति तत्** ( **स्फिक्पायुप्रजननादि** ) ( सुसू. २३.५ )
ज्या अवयवावर झालेला व्रण सुखाने रुजून येतो तो. जसे ढुंगण, गुद, जननेंद्रिय इत्यादी.

**–वर्चस्**–पु., **खनिज० सर्जिकाक्षारः** ( ध. २.२०; पृ. ७२ )
सज्जीखार.

**–साध्य**–वि., **सुखेन साध्यः** ( चसू. २९.७ ) **अगम्भीरः** ( चसू. १०.१३ ) **सुखोपायः** ( सुसू. ३५.४६-४७ ) **भेषजादिना यः शान्तो भवति, ( स व्याधिः ) अयमल्पकालेन साध्यते** ( चनि. ८.३३ )
सुखाने साध्य होणारा. खोल नसणारा, सुखाचा उपाय असलेला. औषध इत्यादींनी जो शांत होतो तो. ( रोग. ) हा थोड्या दिवसात बरा होतो.

**–स्पर्श**–पु., **क्षार० टङ्कणम्** ( र. १९.६९-७२ )
टांकणखार.

**सुखवी**–स्त्री., **वनस्पति० कुडुहुञ्चिका, कारवेल्लम्** ( असंसू. १४.३ ) कारले.

**सुखानुबन्धिन्**–वि., **स्थिरत्वेन सातत्येन वा सुखोत्पादकः** ( सुसू. ४६.५२१; असंसू ५.४८ )
सतत सुख उत्पन्न करणारा. स्थिर सुखदायी.

**सुखाम्बु**–न., **सुखोदकम्** ( चचि. १६.६१ ) **ईषदुष्णं जलम्** ( ड. सुउ. ४४.२५ )
थोडे गरम पाणी, सुखकारक कोमट पाणी.



**सुखाम्भस्**–न., **सुखोदकम्, सुखोष्णं जलम्** ( र. ३०.९१ )
कोमट पाणी.

**सुखार्जिक**–पु., **खनिज० सर्जिकाक्षारः** ( रा. ६.२६; पृ. ७२ )
सज्जीखार.

**सुखालुका**–स्त्री., **वनस्पति० अन्यादोडी** ( रापरि. ४.४१, पृ. ३३८ )
हरिणदोडी.

**सुखावती**–स्त्री., **योग० इयं वर्तिः कतकशङ्खसैन्धवादिनिर्मिता सती तिमिरपटलकाचादिनेत्ररोगनाशिनी** ( चचि. २६.२५२-२५३ )
एक वात (औषधांची) निवळी, शंख, सैंधव इत्यादींनी बनवलेली वात. दृष्टिरोग, पडद्यांचे रोग, काचबिंदु इत्यादी नाशक.

**सुखिन्**–वि., **अनातुरः, व्याधिरहितः** ( चशा. २.६ )
निरोगी, आरोग्यवान, व्याधिरहित.

**सुखोचित**–वि., **सुखी अभ्यस्तसुखः** ( सुसू. ४६.४४४-४४५ )
सुखी. सुखाचा नित्य अनुभव असलेला.

**सुखोदक**–न., **ईषदुष्णोदकम् पिष्टमयस्यान्नस्येदमनुपानम्** ( सुसू. ४६. ४२५ ) **वसन्ततौ शौचविधाविदं प्रशस्तम्** ( चसू. ६.२४; अहसू. ३.१३ ) **अनेनाधःकायपरिषेको बलकरः** ( अहसू. २.१७ )
थोडे गरम पाणी. कोमट पाणी. पिठूळ अन्नावर हे पाणी उत्तम अनुपाम. वसंतऋतूत शरीर स्वच्छ करण्यासाठी हे चांगले. डोक्याच्या खालच्या शरिराला ऊन पाणी स्नानाकरिता चांगले बलवर्धक.

**सुखोद्भवा**–स्त्री., **वनस्पति० आदित्यभक्ता** ( ध. ४.९८; पृ. १५३ )
सूर्यभक्ता, सूर्यमुखी, हुरहुर, सूर्यफूल.

**सुखोपाय**–वि., **सुखो नाम सुकर उपायो यस्य तत्** ( चक. १.३ )
सुलभ उपाय असलेला (रोग).

**सुखोषित**–वि., **सुसुखम् उषितो नाम स्थितः, अर्थात् निशायां सुप्तः** ( असंसू. २७.११ )
रात्री सुखात असलेला, शांत झोपलेला.

( **सुखोषिता** )–स्त्री., **वनस्पति० मूर्वा** (रा. ३.११; पृ. ९)
मोरवेल.

**सुखोष्ण**–वि., **सुखकरमेव औष्ण्यं यस्य** ( सुचि. ८.२४ )
ज्याची उष्णता सुखकर आहे असा.

**सुखोष्णोदकगण्डूष**–पु., **कोष्णजलगण्डूषः, मुखगौरवे सति तल्लाघवापादनोऽयमुपक्रमः** (अहृसू. २२.१०)
कोमट पाण्याच्या गुळण्या. तोंड जड असताना ते हलके होण्याकरिता हा उपाय.

**सुगतिनिम्न**–वि., **सुगत्या गमनशीलः, सदाचारपरः** ( असंसू. ३.१२८ )
चांगल्या चालीने चालणारा. सदाचारी. नित्य सदाचारमग्न.

**सुगन्ध**–पु., **वनस्पति० भूस्तृणम्** ( रापरि. ८.४२ )
रोहिसगवत.
**चणकः** ( ध. ६.१०१ ) चणा, हरभरा.
**धवलयावनालः** ( रा. १६.१६९ ) पांढरा जोंधळा.
न., **वनस्पति० नीलपद्मम्** ( रा. १०.२४८ )
निळे कमळ.
**जवादि** ( रापरि. १२.७ )
सुगंधी द्रव्य. जवादि कस्तूरी.
**खनिज० गन्धकः** ( रा. १३.१६७ ) गंधक.
**भैषज्य० अयमगदः छत्रदुन्दुभ्यादिलेपाद्देहविलेपनाच्च दर्शनश्रवणस्पर्शैः सर्वविषहरः** ( असंउ. ४७ )
विषनाशक एक योग. छत्र, दुंदुभी यांना लेप केल्याने अंगाला लावल्याने, पाहणे, स्पर्श करणे, ऐकणे इत्यादींनी सर्व विषहर.
**कफजकृमिः** ( असंनि. १४.५२ ) कफज कृमी.
**मनःप्रियो गन्धः** ( सुसू. ४६.५२१ )
मनाला आवडणारा वास. सुगंध.
**मूलविषम्** ( सुक. २.५ ) एक विषारी मूळ.

( **सुगन्धा** )–स्त्री., **वनस्पति० रुद्रजटा** ( रापरि. ३.२४ )
रुद्रजटा, शंकरजटा.
**माधवी** ( रापरि. १०.२९ ) कस्तूरमोगरा.
**गङ्गापत्री** ( रापरि. १०.४५ )
सुगंधी पानाची एक वनस्पती.
**नाकुली** ( ध. ४.१०३; पृ. १५४ ) मुंगुसवेल.
**महाशालिः** ( रा. १६.१०८; पृ. २२२ )
साळीचा सुगंधी प्रकार.
**स्पृक्का** ( रा. १२.११३; पृ. १०८ ) पिंडिका.
**सल्लकी** ( रा. ११.१९५; पृ. १२२ ) साळई.
**रास्ना** ( र.१२.१०१–१०३ ) रास्ना.
**शतपुष्पा** ( रा. ४.३; पृ. ६९ ) बाळंतशेप, बडीशेप,
**शेफालिः** ( रा. ४.११९; पृ. १५० ) निर्गुंडी.
**वन्ध्यकर्कोटकी** ( रा. ३.२७४; पृ. ४४ )
वांझकटोली. सोनजुई.
**सुवर्णयूथा** ( रा. १०.२५१; पृ. २०० ) सोनजुई.
**जीरक० कृष्णः** ( रा. ६.१०५; पृ. ८३ )
काळे जिरे.
**ग्रैष्मी** ( ध. ५.१४०; पृ. १९८ ) रानमोगरी.
**गन्धनाकुली** ( इ. असंउ. ४२ ) मुंगुसवेल.
**सर्पसुगन्धा** ( सुक. ५.७६-७८ )
एक सुगंधी वनस्पती.

**–केसर**–पु., **वनस्पति० रक्तशिग्रुः द्र० ‘ शिग्रु ’** ( रा. ७.६६; पृ. १४२ )
लाल शेवगा.

**–पञ्चक**–न., **वनस्पति० कङ्कोलकं पूगफलं लवङ्गकुसुमं जातीफलं कर्पूरश्चेति** (ध. ७.२४; पृ. ३०४)
पाच सुगंधी द्रव्ये. कंकोळ, सुपारी, लवंग, जायफळ व कापूर.

**–पत्रा**–स्त्री., **वनस्पति० रुद्रजटा** ( रापरि. ३.२४; पृ. ३३१ )
घनदाट जटासारखी मुळे असलेली सुगंधी पानांची वनस्पती.

**–पिष्ट**–न., **योग० चन्दनागुरुकर्पूरकुङ्कुमानां पिष्टेन पारदमूर्च्छनं विधीयते। तेन श्रीशिवो विलिप्यते। ‘ पूर्वजन्मकृतं पापं सद्यो नश्यति देहिनाम्। ’** ( र. १.२७ )
एक योग. चंदन, अगरू, कापूर, केशर ही वाटून त्याने पाऱ्याचे मूर्च्छन होते. याचे शंकराला उटणे लावले जाते. पूर्वजन्माचे केलेले पाप ताबडतोब नष्ट होते.

**–प्रसव**–पु., **वनस्पति० शालिः** ( ध. ६.६९; पृ. २१९ ) साळ, तांदूळ.

**–भूतृण**–न., **वनस्पति० गुणाः–तदिदं ईषत्तिक्तं मधुरं शीतं रसायनं कफपित्तघ्नं श्रमापहं सुगन्धि च** ( रापरि. ८.४४.; पृ. ३६० )
सुगंधी रोहिसगवत, थोडे कडु, गोड, थंड, रसायन, कफपित्तनाशक, श्रमनाशक व सुगंधी.

**–मूला**–स्त्री., **वनस्पति० सठी** ( ध. १.६१; पृ. १८ )
कचोरा.
**रास्ना** ( ध. १.२७० ) **पद्मचारिणी** ( रा. ५.१३१; पृ. १५२ )
पाण्यात होणारी जाड सुगंधी मुळांची वनस्पती,

**सुगन्धक**–पु., शालिभेदः द्र० 'शालि' (चसू. २७.९)
साळ, तांदूळ. पहा 'शालि'.
**गन्धशालिः देवशालिः** ( सुसू. २०.५ )
देवसाळ, देवभात.
**तृण० द्रोणपुष्पः** ( सुसू. ३८.१८-१९ )
द्रोणपुष्पी, रोहिसगवत.
**मूलविष०** ( असंउ. ४० ) एक विषारी मूळ.
**खनिज० गन्धकः** ( र. २५.२० ) गंधक.

**सुगन्धाढ्या**–स्त्री., वनस्पति० व्रीहिः
( रा. १६.११८; पृ. २२३ ) तांदळचा एक वर्ग.
**मल्लिका** ( रापरि. १०.२३ ) **वृत्तमल्लिका**
( रा. १०.२२७; पृ. १९७ )
बटमोगरा.

**सुगन्धामलक**–न., वनस्पति० सर्वौषधिकयुक्ताः शुष्का आमलकत्वचः ( ध. ७.४१; पृ. ३०४ )
अनेक औषधे घातलेली आवळीची सुकलेली साल.

**सुगन्धि**–पु., वनस्पति० गुण्डकन्दः
( रापरि. ८.६३; पृ. ३६२ )
लहान नागरमोथा.
**सुमुखः** ( रा. १०.८८; पृ. १४६ ) रानबाभूळ.
**तुम्बुरुः** ( रा. ११.६६; पृ. ७८ )
रानकोथिंबीर, फुटलेल्या मिऱ्यासारख्या सुगंधी फळाची वनस्पती.
**मुस्ता** ( रा. ६.५९; पृ. १५ ) नागरमोथा.
**चन्दनभेदः बर्बरकः** ( रा. १२.१७; पृ. ९५ )
चंदनाचा प्रकार.
**वनस्पति० धान्यकम्** ( रा. ६.९८; पृ. ८२ ) धणे.
**भैषज्य० तुरुष्कः** ( ध. ३.२३; पृ. ९८ )
सरळ देवदाराचा डिंक, धूप, ऊद.
**शालि० गन्धशालिः** ( रा. १६.९३; पृ. २२१ )
एक प्रकारची साळ, तांदूळ.
–**त्रिफला**–स्त्री., वनस्पति० जातीफलम्, एला लवंगफलं च ( ध. ७.५; पृ. २९९ )
जायफळ, वेलदोडा व लवंग.
–**मूलक**–न., वनस्पति० उशीरम्
( रा. १२.२७; पृ. ९७ )
काळा वाळा.

**सुगन्धिक**–न., वनस्पति० एलवालुकम्
( रा. ४.१३४; पृ. १११ )
एक सुगंधी द्रव्य.
**उशीरम्** ( रा. १२.२६; पृ. ९७ ) काळा वाळा.

( **सुगन्धिका** )–स्त्री., वनस्पति० सर्पगन्धिका
( इ. असंउ. ४२; सुक. ५.६८-७३ )
एक सुगंधी वनस्पती.
**उत्पलसारिवा** ( सुचि. १७.८ ) अनंतमूळ.

**सुगन्धिनी**–स्त्री., वनस्पति० सुवर्णकेतकी
( धपरि. ५.१; पृ. २०४ )
पिवळी केवडी, सोनकेवडा.

**सुगृहा**–स्त्री., पक्षि० पीतमस्तका प्रतुदजातीयाऽसौ
( ड. सुसू. ४६.६७ )
पिवळ्या डोक्याची पक्षिणी. भक्ष्याला टोचून टोचून खाणाऱ्या पक्ष्यापैकी एक.

**सुगृहीत**–वि., सुष्ठु हस्तेन धृतम् ( सुसू. ८.१४
चांगले धरलेले–घेतलेले.

**सुग्रन्थि**–पु., वनस्पति० चोरकः
( रा. १२.१२८; पृ. ११० ) चोरओवा.
**पिप्पलीमूलम्** ( रा. ६.११३; पृ. ८४ ) पिंपळमूळ.

**सुचञ्चु**–स्त्री., वनस्पति० क्षुद्रचञ्चुः
( रा परि. ४.२२; पृ. ३३६ )
एक भाजी. लाल एरंड.

**सुचञ्चुका**–स्त्री., वनस्पति० बृहच्चञ्चुः
( रापरि. ४.२०; पृ. ३३६ )
मोठ्या पानाचा दिव्य गंध असलेला एक वृक्ष.

**सुचर्मन्**–पु., वनस्पति० भूर्जः
( रापरि. ९.२२; पृ. ३६५ ) भूर्जपत्र.

**सुचित्रबीजा**–स्त्री., वनस्पति० विडङ्गम्
( रा. ६.१६; पृ. ७१ ) वावडिंग.

**सुचित्रा**–स्त्री., वनस्पति० चिर्भटम्
( रा. ७.२६२; पृ. ४२ ) चिभडे.

**सुचौक्ष**–न., सुविशुद्धम् ( चचि. १(४).२१ )
चांगले, विशुद्ध.

**सुजाता**–स्त्री., खनिज० सौराष्ट्री
( रा. १३.१६५; पृ. ११६ ) तुरटी.

**सुजीवन्ती**–स्त्री., वनस्पति० हेमा
( रापरि. ३.१३; पृ. ३३० )
पिवळ्या फुलांची पिवळी वेल गळ्यात घालतात.

**सुतजीवक**–पु., वनस्पति० पुत्रजीवः
( रापरि. ९.३१; पृ. ३६६ )
पुत्रजीव वृक्ष, याच्या फुलांच्या माळा, गळ्यात घालतात.

**सुतपादुका**–स्त्री., वनस्पति० हंसपादि
(रा. ५.१६७; पृ.१५६)
हंसपादी, राजहंस.

**सुतश्रेणी**–स्त्री., वनस्पति० दन्ती (चक. १२.३)
**गुणाः** – कटुश्चक्षुष्याऽऽखुविषव्रणदोषनेत्रामयनिकृन्तनी (रापरि. ४.१६; पृ. ३३६)
दांती.–**गुण**–तिखट, डोळ्याला हितकर, उंदराचे विष, व्रणदोष, डोळ्याचे रोग नाशक.

**सुतार**–पु., खनिज० पारदः (सुक. ३.१४–१५) पारा.

**सुतिक्त**–पु., वनस्पति० पर्पटः (रा. ५.६६; पृ. १६)
पित्तपापडा.

**(सुतिक्ता)**–स्त्री., वनस्पति० कोशातकी (ध. १.१९२; पृ. ४६)
घोसाळे, दोडके.

**सुतिक्तक**–पु., वनस्पति० निम्बः (ध. १.२९; पृ. १३)
निंब.

**सुतिन्तिडी**–स्त्री., वनस्पति० अम्लिका
(ध. ५.३३; पृ. १७४)
चिंच.

**सुतीक्ष्ण**–पु., वनस्पति० शिग्रुभेदः द्र० 'शिग्रु'
(रा. ७.६४; पृ. १४२)
शेवग्याचा प्रकार.
न., वनस्पति० मरिचम् (र. २५.११९) मिरे.

**सुतीक्ष्णक**–पु., वनस्पति० मुष्ककः
(रा. ११.२२१; पृ. १९६)
मोखा वृक्ष.

**सुतीर्थ**–वि., शोभनं तीर्थं पवित्रजलं यस्य सः (जलाशयादिः) (अहृसू. १३.८)
ज्याचे पाणी शुद्ध व पवित्र आहे असा झरा, कुंड, नदी इत्यादी.

**सुतुङ्ग**–पु., वनस्पति० नारिकेलः
(ध. ५.७४; पृ. १८३)
नारळ. खूप उंच वृक्ष.

**सुतृण**–पु., वनस्पति० मज्जरः
(रापरि. ८.५२; पृ. ३६१)
स्निग्ध पानांचे मऊ गाठींनी युक्त एक गवत.
**उखलः** (रापरि. ८.४६; पृ. ३६०)
पुष्कळ व चांगल्या पानांचे उत्तम गवत.

**सुतेजस्**–पु., वनस्पति० सुवर्चला
(रा. ४.१४४; पृ. १५३)
सूर्यमुखी.

**सुतैला**–स्त्री., वनस्पति० तेजोवती
(रा. ३.३९२; पृ. ६१)
मोठी मालकांगोणी.

**सुत्वक्त्व**–न., शोभना त्वग्यस्य सः तत्त्वम्
(अहृसू. २.८)
चांगली त्वचा असणे.

**सुदग्ध**–वि., सम्यग् दग्धम् (अहृसू. ३०.४५-४६)
योग्य तितकेच जळालेले असणे. योग्य तितकाच डाग दिलेला असणे.

**सुदग्धिका**–स्त्री., वनस्पति० दग्धा
(रापरि. ९.२८ पृ. ३६६)
जळालेली, पुन्हा वाढणारी, लव असलेली खरखरीत पानांची वनस्पती.

**सुदण्ड**–पु., वनस्पति० वेत्रः
(रापरि. ७.१४; पृ. ३४८)
वेत. पेरी मऊ असणारा, चांगला, सुरेख दंड होणारा.

**सुदर्भा**–स्त्री., वनस्पति० इक्षुदर्भा
(रापरि. ८.४७; पृ. ३६१)
लव्हाळा.

**सुदल**–पु., वनस्पति० मुचकुन्दः
(रापरि. १०.२५; पृ. ३७०)
पुष्कळ व चांगल्या पानांचा व फुलांचा वृक्ष.

**(सुदला)**–स्त्री., वनस्पति० तरणी
(रा. १०.२४४; पृ. २००)
सालवण, शेवती, काटेशेवती.
**शालिपर्णी** (रा. ४.११३; पृ. २३) सालवण.

**सुदारु**–न., वनस्पति० देवदारुः (ध. १.७७; पृ. २१)
देवदार.

**सुदीन**–पु., सुष्ठु नाम सुतरां म्लानः (सुउ. ६२.१३)
अतिशय म्लान, अतिशय केविलवाणा.

**सुदीर्घा**–स्त्री., वनस्पति० चीणाकर्कटी.
(रा. ७.२६०; पृ. ४२)
चिकणकाकडी.

**सुदृढत्वचा**–स्त्री., वनस्पति० काश्मरी
(रा. ९.१४८; पृ. २९)
शिवण.

**सुधा**–स्त्री. वनस्पति० स्नुही (चक. १०.१३) सेहुण्डः
(सुचि. १८.५२. रा. ८.३५५, पृ. ५६)
त्रिधारी निवडुंग.

शालिपर्णी ( रा. ४.११४ ) सालवण.

अमृतम् (चचि. १०७८; र. २.९४–९६) अमृत.

क्षारचूर्णम्, गाङ्गेयिका

( चसू. १.७० र. १२.३८–३९ ) चुना.

भैषज्य० तवराजशर्करा ( रा. १४.१६५; पृ. ९२ )

धमाशाची साखर.

**–कल्प** ( पु. ) अध्यायसंज्ञा सुधायाः कल्पः

( चक. १०.१ )

अध्यायाचे नाव. यात त्रिधारी निवडुंगाचे कल्प आहेत.

**–काण्ड**–न; स्नुह्याः काष्ठम् तद्दग्ध्वा कृतः क्षारः असौ ग्रहण्यां क्षारगुटिकायां प्रयोज्यः

( चचि–१५.१८३–१८४ )

त्रिधारी निवडुंगाचे लाकूड, कांडे. ते जाळून केलेला क्षार. हा ग्रहणीमध्ये क्षारगुटिकेत योजावा.

**–क्षीर**–न., स्नुहीक्षीरम्, उदरे उपयुक्तम्

( चचि. १३.१३८ )

त्रिधारी निवडुंगाचे दूध. उदरात उपयुक्त.

**–पयस्**–न., स्नुहीक्षीरम् क्षीरविरेचनानां मध्ये सुधापयः श्रेष्ठम् ( सुसू. ४४.३-४ )

त्रिधारी निवडुंगाचे दूध. विरेचक दुधामध्ये श्रेष्ठ दूध.

**–शर्करा**–स्त्री., सुधापाषाणः ( सुसू. ११.११ )

चुनखडी.

**–सार**–पु., योग० पारदगन्धकादियुक्तः कुटजटुण्टुकादि क्वाथभावितः सिद्धयोगः, अयं दीपनपाचनग्राहीहृद्यरोचकोऽतिसारविसूचीज्वरांश्च नाशयेत् ( र. १६.११-१९ )

पारा, गंधक इत्यादीयुक्त कुडा, टेंटू इत्यादिकांची भावना असलेला सिद्धयोग. हा दीपक, पाचक, मळ बांधणारा, हृदयाला हितकर अरोचक, अतिसार, विषूचिका, ज्वर यांचा नाशक.

**–स्रवा**–स्त्री., वनस्पति० रुदन्ती

( रापरि. ५.१५ पृ. ३४१ )

रानहरभरा, रुदंती.

**सुधांशुभ**–न.,–भैषज्य० मौक्तिकम्

( रा. १३.६७; पृ. ३१८ )

मोती.

**सुधांशुरत्न**–न., भैषज्य० मौक्तिकम्

( रा. १३.६७; पृ. २१० )

मोती.

**सुधान्य**–न., वनस्पति० व्रीहिः

( रा. १६.१०१; पृ. २२२ )

तांदळाचा एक वर्ग.

**सुधाश्मन्**–पु., सुधायाः खण्डः ( अहृसू. ३०.१३ )

चुनखडी.

**सुधूपक**–पु., निर्यास० श्रीवेष्टकः

( रा. १२.१९३; पृ. १२१ )

सरल देवदाराचा डिंक. धूप.

**सुधूम्य**–पु., वनस्पति० अगरुः (रा. १२.३९; पृ. ९९ )

अगरू.

**सुनन्दा**–स्त्री., वनस्पति० रास्ना ( असंसू. ८.७३ )

रास्ना.

**सुनन्दिनी**–स्त्री., वनस्पति० आरामशीतला

( रापरि. १०.५२ पृ. ३७२ )

एक सुगंधी वनस्पती.

**सुनादक**–पु., भैषज्य० शङ्खः

( रा. १३.२४३; पृ. १३० )

शंख.

**सुनाल**–न., वनस्पति० लामज्जकम्

(ध. ३.८६; पृ.११३)

वाळ्यासारखे पिवळट गवत.

**सुनासिका**–स्त्री., वनस्पति० काकनासा

( रा. ३.४०; पृ. १३९ )

तांबडे तेड; कावळीचा एक प्रकार.

**सुनिद्रुम**–पु., वनस्पति० टिण्टुकः

( रा. ९.१४१; पृ. २८ )

टेंटु.

**सुनिरूढ**–वि., सम्यग्दत्तबस्तिः ( असंसू. २८.४४ ) तस्य लक्षणम्–यस्याऽऽस्थापनानन्तरं विट्पित्तकफवायवः क्रमेण गच्छन्ति तथा लाघवं चोपजायते, सः सुनिरूढो विज्ञेयः ( सुचि. ३८.१०-११ )

ज्याला बस्ती व्यवस्थित दिलेला आहे असा. **लक्षण**– बस्ती दिल्यावर ज्याचे मळ, पित्त, कफ, वात, क्रमाने जातात तसेच ज्याला हलके वाटते तो.

**–लिङ्ग**–न., सुनिरूढलक्षणम् प्रसृष्टविण्मूत्रसमीरणत्वादि ( चसि. १.४१-४२ )

ज्याला बस्ति व्यवस्थित लागू झाल्याची लक्षणे. मळ मूत्र वात ही साफ होणे इत्यादी.

**सुनिर्घोषा**–स्त्री., वनस्पति० जिङ्गिणी

( ध. परि. ३.२२; पृ. १३२ )

काळी सावरी.

**सुनिर्धूत**–न., सुष्ठु धूतम् ( चशा. ८.४१ )
चांगले धुतलेले.

**सुनिशित**–न., सुतीक्ष्णम्
( सुसू. ८.१४; अहृसू. २९.१७ )
चांगले तीक्ष्ण, तीक्ष्ण धारेचे.

**सुनिषण्ण**–पु., वनस्पति० **शिखालिका, चतुष्पर्णी, इत्यपरे**
(ड. सुउ.४५.१६., अहृसू. ६.७२; असं कास चि. ४)
कुरडू. पाण्यावर होणारी गोल आकाराच्या चार पानांची वनस्पती. इतर नावे शिखालिका, चतुष्पर्णी.

**–चाङ्गेरीघृत**–न., **इदम् अर्शोघ्नघृतम्**
( चचि. १४.२३४-४२ )
कुरडू, चुका इत्यादींनी सिद्ध तूप. मूळव्याधनाशक.

**–देह**–वि., **सुविश्रान्तशरीरः** ( ड. सुचि. ३८.३ )
चांगली विश्रांती मिळालेले शरीर.

**सुनिषण्णक**–पु., वनस्पति० जलशाकः अयं ग्राही, **त्रिदोषघ्नश्च** ( चसू. २७.८८; सुसू. ४६. २६२-६५ )
शेवाळ. मळ बांधणारी, त्रिदोषशामक भाजी.
**वनस्पति० शिखालिका** ( सुसू. २०.५ )
**चतुष्पत्री** ( सुउ. १७.५० ) कुरडू.
**शितिवारः** ( ध. १.१५५; पृ. ३६. अहृसू. ८.४२; असं. अर्श चि. १० )
कुरडूभाजी.

**सुनिष्पूत**–वि., **सुगालितः** ( चवि. ७.२५ )
चांगला गाळलेला.

**सुनील**–पु., **वनस्पति० दाडिमः** (रा. ११.९४; पृ. ८२)
डाळिंब.
**असनः** ( ध. ५.१२५; पृ. १९५ ) असाणा.

**( सुनीला )**–स्त्री., **वनस्पति० चणिका**
( रापरि. ८.६५; पृ. ३६२ )
हिरवीगार दुधाळ जमिनीवर होणारी वनस्पती.
**गर्मोटिका** ( रा परि. ८.५१; पृ. ३६१ )
पाण्यात होणारी हिरवीगार वनस्पती.
**अतसी** ( रा. १६.१८७; पृ. २३१ ) अळशी.

**–पुष्पा**–स्त्री., **वनस्पति० अतसी**
( ध. ६.११४; पृ. २३१ )
अळशी.

**सुनीलक**–पु., **वनस्पति० नीलबीजः**
( रा. ९.२०९; पृ. १९५ )
हिरव्या बीचा–पानांचा, नाराचा, डिंकाचा व हिरवागार दिसणारा वृक्ष, राळेचा एक वृक्ष.

**सुन्दर**–पु., **वनस्पति० तिलकः** ( रा.१०.२६७पृ.२०२ )
तिळवा.
न., **भैषज्य० कान्तलोहम्** ( र. १६.१२२-२५ )
कान्त लोह. लोखंडातले सर्वोत्कृष्ट लोह.

**( सुन्दरी )**–स्त्री., **वनस्पति० काकमाची**
( र. ४.३६; पृ. १३८ ) कावळी.

**सुपत्रक**–पु., **वनस्पति० शिग्रुः** ( रा. ७.६०; पृ. १४२ )
शेवगा.

**( सुपत्रा )**–स्त्री., **वनस्पति० पालक्यम्**
( रापरि. ७.७२; पृ. ३५३ ) पालक.
**रुद्रजटा** ( रा परि. ३.२४ पृ. ३३१ )
सुगंधी व सुंदर पानांची वनस्पती.
**शालिपर्णी** ( रा. ४.११५; पृ. २३ ) सालवण.
**शमी** ( रा. ८.१५३; पृ. १८८ ) शमी.
**शतावरी** ( रा. ४.४३८; पृ. ६७ ) शतावरी.

**( सुपत्रिका )**–स्त्री., **वनस्पति० जन्तुका**
( रा. ३.१२७; पृ. १५१ )
गाठी असलेल्या पुष्कळ पानांची लांब, वाकडी खाज-कुहिलीच्या फळासारखी फळे असणारी बारीक वेल.
**शालिपर्णी** ( ध. १.८८; पृ. २३ ) सालवण.

**सुपरिग्रहण**–न., **बलवतो नियन्त्रणम्** ( सुचि. ६.४ )
बलवान मनुष्याने व्यवस्थित धरणे.

**सुपरिमार्जित**–न., सुष्ठु निर्मार्जितम्
(ड.सुचि.३५.१५ ) चांगला धुतलेला–स्वच्छ केलेला.

**सुपरिस्रुत**–वि., **वस्त्रादिभिः सुष्ठु गालितं, तद्गुणाः- वातघ्नं कफकृत् स्निग्धं बृंहणं नातिपित्तकृत् भक्ताभिलाषकृतं च** ( सुसू. ४५.७६-७७ )
वस्त्रादिकांनी चांगले गाळलेले (दही) **गुण**— वातनाशक, कफकर, स्निग्ध, शुक्र वाढवणारे, थोडे पित्तकर, जेवणाची इच्छा उत्पन्न करणारे.

**सुपर्ण**–पु., **पक्षि० गरुडः** ( सुक. ४.२१ ) गरुड.
**वनस्पति० लघुजातीयो राजवृक्षः** ( र. ३०.४२ )
लहान जातीचा बहावा.

**( सुपर्णी )**–स्त्री., **वनस्पति० पलाशी**
( रापरि. ३.४९; पृ. ३३३ )
लांबट, आंबट पानाची लांब वेल.
**रेणुका** ( रा. ६.१००; पृ. १०६ ) रेणुकबीज.

**सुपर्णक**–पु., **वनस्पति० सप्तपर्णः** (ध. ३.८०; पृ. ११२)
सातवीण.

**( सुपर्णिका )**–स्त्री., वनस्पति० शालिपर्णी
( रा. ४.११३; पृ. २३ ) सालवण.

**सुपर्णाक्षी**–स्त्री., वनस्पति० वत्सादनी ( र. ३०.४३ )
गुळवेल.

**सुपाकिनी**–स्त्री., वनस्पति० गन्धपलाशः
( रा. ६.९०; पृ. १९ ) कचोरा ( एक प्रकार ).

**सुपाक्य**–न., भैषज्य० लवणविशेषं बिडम्
( ध. २. २८ पृ. ७४ )
बिडलवण, बिडलोण.

**सुपार्श्व**–पु., वनस्पति० प्लक्षः ( ध. ५.८१; पृ. १८५ )
नांदरुख, पिंपरी, पायरी.

**सुपिङ्गला**–स्त्री., वनस्पति० ज्योतिष्मती
( रा. ३.३९५; पृ. ६१ )
मालकांगोणी.
जीवन्ती ( रा. ३.१७८; पृ. ३३ ) हरिणदोडी.

**सुपिष्ट**–वि., सुचूर्णितम् ( सुचि. १.३७ )
चांगले वाटलेले, सूक्ष्म चूर्ण केलेले.

**सुपीत**–पु., वनस्पति० किङ्किरातः
( रा. १०.४१५; पृ. ६४ )
चांगलाच पिवळा व सुगंधी फुलांचा वृक्ष.
न. वनस्पति गर्जरम् ( ध. ४६९ पृ. १४७) गाजर.

**सुपुट**–पु., वनस्पति० कोलकन्दः
( रापरि. ७.३८ पृ. ३५० )
कोचिंदा.
विष्णुकन्दः ( रा परि. ७.४० पृ. ३५० )
दीर्घवर्तुळाकार मोठा पुडे असलेला पाण्यात होणारा एक कंद.

**सुपुष्करा**–स्त्री., वनस्पति० पद्मा
( ध. ४. ९०; पृ. १५२. )
सुगंधी मुळांची पाण्यात होणारी वनस्पती.

**सुपुष्प**–पु., वनस्पति० अर्कभेदः श्वेतार्कः
( रा. १०.२९ पृ. १३७ ) रुईचा प्रकार.
वनस्पति० हरिद्रुः ( रा. परि ९.२६ पृ. ३६६ )
पिवळ्या खोडाचा एक वृक्ष.
वनस्पति० मुचकुन्दः (रापरि. १०.२५. पृ. ३७०)
चांगल्या व पुष्कळ पानांचा, सुंदर फुलांचा वृक्ष.
वनस्पति० राजतरणी ( रा. १०.२४६, पृ. २०० )
काटेशेवती.
न., वनस्पति० प्रपौण्डरीकम् (ध. ३.९२; पृ. १४४)
पांढऱ्या व चांगल्या फुलाची वनस्पती.
आढुल्यम् ( रा. परि. ४.३३; पृ. ३३६ )
तरवट, तरवड.
तूलम् ( रा. ९८६; पृ. १.८१ )
निळ्या देठाचा चांगल्या फुलांचा मऊ नाराचा वृक्ष.

**( सुपुष्पा )**–वनस्पति स्त्री० द्रोणपुष्पी
( रा. परि. ५.४८; पृ. ३४४ )
द्रोणपुष्पी, कुंभा.
मिश्रेया ( रा. ४.६; प. ६९ ) बडिशेप.
कोशातकी (रा. ७.२८८; पृ. ४६) दोडके, घोसाळे.

**( सुपुष्पी )**–स्त्री., वनस्पति० शङ्खपुष्पी
( रा. ३.१७०; पृ. १५७ )
शंखपुष्पी, सांखवेल.

**सुपुष्पक**–पु., वनस्पति० शिरीषः
( रा. ९.१८८; पृ. १९२ )
शिरीष, शिरस.

**( सुपुष्पिका )**–स्त्री., वनस्पति० शतपुष्पा
( रा. ४.२; पृ. ६९ )
बडिशेप.
जीर्णदारुः ( रा. ३.१५७; पृ. १५५ ) वरधारा.

**सुपूजका**–स्त्री., वनस्पति० व्रीहिः
( रा. १६.१०८; पृ. २२२ )
एका जातीचा तांदूळ.

**सुपूरक**–पु., वनस्पति० मातुलुङ्गः
( ध. ५.२२; पृ. १७२ )
महाळुंग.

**सुपूरणी**–स्त्री., वनस्पति० शाल्मली
( ध. ५.१२७; पृ. १९५ )
सावर, सावरी.

**सुप्त**–वि., लक्षण० मन्दक्रियम् ( चसू. १७.३५ )
मंद क्रियेचा. हळू, सावकाश क्रिया करणारा.
अचेतनम् ( सुसू. १२.१० )
ज्ञान नसलेला, निरिंद्रिय, जड.
मन्दवेदनम् ( चचि. ५.४३ ) मंद वेदना, दुःख.

**–ता**–स्त्री., अधःकायस्य सुप्तिः ( का सिद्धि. ५.९ )
चरणयोः स्पर्शाज्ञानम् ( चनि. १.२१ )
स्पर्शनाश, शरिराच्या खालच्या भागातील त्वचेला स्पर्श न कळणे. पायाना स्पर्शाचे ज्ञान न होणे. सुन-बहिरी.

**–त्व**–न., **नखमक्षिकामशकादिदंशवेदनानभिज्ञत्वम्** ( सुसू. २२.११ )

नख, माशा, डास इत्यादींच्या दंशाच्या वेदना न कळणे.

**–त्वक्**–वि., **सुप्ता नाम बधिरा त्वग्यस्य सः, बधिरत्वक्** ( सुसू. ३३.७ )

सुप्त म्हणजे बधिर आहे त्वचा ज्याची असा.

**–रूक्षच्छवि**–स्त्री., **जराशोषे लक्षणविशेषः। यद्यपि सुप्तरूक्षत्वं त्वचि भवति तथापि उपचारात् प्रभायां बोद्धव्यम् " ष्ठीवति श्लेष्मणा हीनं गौरवा-रुचिपीडितः, संप्रस्रुतास्यनासाक्षः सुप्तरूक्ष-मलच्छविः "** ( सुउ. ४१.२० )

वृद्धावस्थेमुळे होणाऱ्या शोषरोगात शरीर सुकू लागले की जरी त्वचा बधिर आणि रूक्ष होते तरी उप-चाराने शरीरप्रभा जाणावी. त्या प्रकारच्या क्षयात कफरहित थुंकी येणे, जडत्व, अरुचि, तोंड, नाक, डोळ्यातून पाणी येणे व त्वचा बधिर आणि रूक्ष, कांतीही तशीच आणि मलसुद्धा रूक्ष ही लक्षणे होतात.

**–सिरा**–स्त्री., **निःस्पन्दा सिरा** ( चचि. २८.३६ )

स्पंदन–गति नसलेली शीर.

**–सुप्त**–न., **सुप्तवत् सुप्तमचेतनम्** ( चचि. ७.५६ )

अचेतनासारखे सुप्त, अतिसुप्त. अतिशय स्पर्शनाश–संज्ञानाश.

**सुप्ताङ्गता**–स्त्री., **लक्षण० गात्राणां स्पर्शाज्ञता, सुप्तानि च तान्यङ्गानि च, तेषां भावः** ( सुउ. ३९.३५ )

अवयवांची सुप्तता, स्पर्शहीनता. स्पर्शहीन अंगाचा भाव; बधिरावयवत्व.

**सुप्ति**–स्त्री., **लक्षण० स्पर्शाज्ञता** ( सुसू. २८.२१; सुनि. १.२५; अहसू. ७.१९ )

स्पर्श न कळणे, त्वग्बाधिर्य.

**–वात**–पु., **रक्तावरणक्रिया सुप्ततया लक्षितो वातः** ( सुचि. ४.१२ ) **तस्य चिकित्सा--सुप्तिवाते नाम स्पर्शाज्ञानलक्षणे भिषजा पुनःपुनरल्पाल्पं रक्तमोक्षः करणीयः। अल्पाल्पस्रावणेन वातप्रकोपो न स्यादिति। रक्तमोक्षानन्तरं च स व्रणः आगार-धूमतैललवणैर्लेपनीयः** ( सुचि. ४.१३ )

रक्ताने आवृत झालेला वात स्पर्शनाश करितो. उपचार— स्पर्श कळत नसेल तर पुनः पुनः थोडे थोडे रक्त काढावे. थोडे थोडे रक्त काढले तर वात-प्रकोप होणार नाही. रक्तस्रावानंतर त्या व्रणावर घेरोसा, तेल, सैंधव यांचा लेप करावा.

**सुप्रतिभा**–स्त्री., **आसुत० सुरा** ( रा. १४.३०३; पृ. २५४ )

दारू.

**सुप्रतिष्ठित**–पु., **वनस्पति० उदुम्बरः** ( रा. ११.१३६; पृ. १८६ )

उंबर.

**सुप्रभ**–पु., **वनस्पति० पद्मकः** ( ध. ३.८८; पृ. ११३ )

पद्मकाष्ठ.

**( सुप्रभा )**–स्त्री., **वनस्पति० बाकुची** ( रा. ४.२२६; पृ. ३८ )

बावची.

**सुप्रलूम**–वि., **निस्तुषीभूतः** ( चवि. ७.२५ )

तुषविरहित. तूस काढलेले.

**सुप्रशस्त**–पु., **वनस्पति० बनबर्बरिका** ( ध. ४.५८; पृ. १४५ )

रानबाभूळ.

**सुप्रसन्नक**–पु., **वनस्पति० वनबर्बरिका** ( रा. १०.८८; पृ. १४६ )

रानबाभूळ.

**सुप्रसरा**–स्त्री., **वनस्पति० प्रसारणी** ( ध. १.२८९; पृ. ६६. )

चांदवेल.

**सुफल**–पु., **वनस्पति० बदरम्** (रा. ११.१५७; पृ. १८९)

बोर.

**कर्णिकारः** ( रा. ९.३३६; पृ. ५३ ) बहावा.

**दाडिमः** ( रा. ११.९३; पृ. ८२ ) डाळिंब.

**आम्रः** ( ध. ५.३; पृ. १६९ ) आंबा.

**( सुफला )**–स्त्री., **वनस्पति० इन्द्रवारुणी** ( रा. ३.२७१; पृ. ५८ )

इंद्रवारुणी. कवंडळ.

**कूष्माण्डः** ( रा. ७.२६९; पृ. ४२ )

कोहोळा, भुरा कोहळा.

**कदली** ( रा. ११.१०६; पृ. १४८ ) केळ.

**काश्मरी** ( रा. ९.१४८; पृ. २९ ) शिवण.

उत्तरापथिका ( रा. ११.७७; पृ. १८० )
द्राक्षाचा एक प्रकार.

**सुफा**-पु., वनस्पति० इङ्गुदी (रापरि. ८.१७; पृ. ३५८)
हिंगण बेट.
पल्लिवाहः ( रापरि. ८.५६; पृ. ३६२ )
तांबडे, अतिशय लांब गवत.

**सुफेन**-न., भैषज्य० समुद्रफेनः (रा. ६.२१७; पृ. १२६)
समुद्रफेस.

**सुबाधक**-वि., कृच्छ्रसाध्यम् ( कीटदष्टम् )
( ड. सुक. ८.४१ )
कष्टाने साध्य होणारा ( किड्याचा दंश ).

**सुबाहु**-पु., राज० यत्पुत्रा राजतैलोपयोगेन गत्यायुर्बल-सुखभाजो बभूवुः ( का. फक्करोग चि. )
एक राजा. ज्याची मुले राजतैलाच्या उपयोगाने चालायला लागली त्याना आयुष्य बल सुख (आरोग्य) लाभले.

**सुबीज**-पु., वनस्पति० खस्तिलः (रा. ४.१९०; पृ. २३२)
खसखस.
बदरम् ( रा. ११.१५७; पृ. १८९ ) बोर.

**सुबुद्धि**-पु., प्राचीनो रसाचार्यः ( र. ६.४९ )
पारदाच्या शास्त्रातला प्राचीन आचार्य.

**सुभग**-पु., वनस्पति० अशोकः ( रा. १०.२७१; पृ. २०३ )
अशोक.
कुरुबकः ( रा. १०.४१३; पृ. ६४ ) कोऱ्हांटा.
चम्पकः ( रा. १०.२३८; पृ. १९९ ) चाफा.
न., शैलेयम् ( रा. १२.१३१; पृ. १११ )
दगडफूल.
पु., टङ्कणक्षारः ( रा.६.२८; पृ. ७३ ) टांकणखार.
वि., मनोरमाकारः ( सुशा. ४.७२ )
सुडौल आकाराचा, भाग्यवान.

**( सुभगा )**-स्त्री., वनस्पति० सुवर्णकदली
( रा. ११.११४; पृ. १४९ )
सोनकेळ.
कैवर्तिका ( रापरि. ३.३५; पृ. ३३२ )
एक वेल.
भैषज्य० कस्तूरिका ( रा. १२.४६; पृ. १०० )
कस्तूरी.
वनस्पति० वार्षिकी ( ध. ५.१३६; पृ. १९७ )
तीन पुटांची त्रिकोणी वनस्पती.
प्रियङ्गुः ( रा. १२.२९; पृ. ९७ ) गव्हला.



शालिपर्णी ( रा. ४.११४; पृ. २३ ) सालवण.
नीलदूर्वा ( रा. ८.२२७; पृ. १६३ ) निळी दूर्वा.
सुरसा ( रा. १०.७७; पृ. १४४ ) तुळशी.

**सुभगाह्वा**-स्त्री., वनस्पति० हरिद्रा (रा. ६.८१; पृ. १८)
हळद.

**सुभगेच्छा**-स्त्री., सौभाग्येच्छा वशीकरणवांछा
( सुक. १.४-६ )
सौभाग्याची इच्छा. वशीकरणाची इच्छा.

**सुभद्रा**-स्त्री., वनस्पति० सठी ( ध. ६.८७; पृ. १९ )
कचोरा.
शमी ( रा. ८.१५२; पृ. १८८ ) शमी.
काश्मरी ( रा. ९.१४६; पृ. २९ ) शिवण.

**सुभिक्ष**-वि., धनधान्यसंपन्नम् ( असंसू. ३.११५ )
धनधान्यसंपन्न. सुबत्ता.

**( सुभिक्षा )**-स्त्री., वनस्पति० धातकी
(ध. ३.९०; पृ. ११३)
धायटी.
सुबुभुक्षा ( चशा. ८.२७ ) चांगली भूक.

**सुभूतिगौतम**-पु., ऋषि० ( सुशा. ३.३२ ) एक ऋषि.

**सुभृङ्ग**-पु., वनस्पति० भृङ्गराजः ( र. ११. १०८ )
माका, भांगरा.

**सुभृत**-वि., अतिमेदुरम् ( इ. असंचि. १२ )
अतिमेदस्वी.

**सुभोजक**-पु., वनस्पति० व्रीहिः
( रा. १६.११३; पृ. २२२ )
तांदळाचा एक प्रकार.

**सुमकरन्द**-पु., वनस्पति० कुन्दः
( ध. ५.१५०; पृ. २०१ )
कुंद.

**सुमङ्गल्य**-न., वनस्पति० चिडा ( ध. १.८२; पृ. २२ )
रोहिसगवत.

**सुमदन**-पु., वनस्पति० आम्रः ( रा ११.३; पृ. १७० )
आंबा.

**सुमन**-पु., वनस्पति० गोधूमः (रा.१६.१५१; पृ. २२७)
गहू.

**(सुमना)**-स्त्री., वनस्पति० शतपत्री
( ध. ५. १५१; पृ. २०१ )
सुगंधी अनेक पाकळ्यांच्या फुलांची वनस्पती.

**सुमनत्**-स्त्री., वनस्पति० जातीपुष्पम्
(ड. सुउ. ३९.२३२)
जाईचे फूल.

उदकीर्यः ( रा. ९.१८०; पृ. १९१ )
मोठा करंज.

**सुमनस्**–न., वनस्पति० जाती ( चसू. ३.४; सुसू. ३७.१२ )
जाई.

( **सुमनः** )–**कोरक**–पु., जातीमुकुलकः ( चचि. २६.२४१ )
जाईच्या फुलाची कळी.

–**पत्रिका**–स्त्री., वनस्पति० जातिपत्री ( ध. ३.३३; पृ. १०२ )
जायपत्री.

–**फल**–न., जातीफलम् ( सुसू. ४६.४८५; रा. १२.६७; पृ. १०२ )
जायफळ.

( **सुमनो** )–**मुकुल**–न., वनस्पति० जातिकलिका ( सुसू. ३७.३१ )
जाईच्या फुलाची कळी.

**सुमनादिकषाय**–पु., कल्प० जातीसौमनस्यायनीहरिद्रादिभिः सिद्धः कषायोऽयं वमनोपयोगी ( चवि. ८.१३५ )
जाई इत्यादींचा काढा. यात जाई, जाईच्या कळ्या, हळद इत्यादी औषधे आहेत. वांतीचे औषधांबरोबर उपयुक्त.

**सुमनादिशोधनतैल**–न., व्रणशोधनतैलम्, सुमनारुष्कराङ्कोठसप्तपर्णकल्ककषायसिद्धं तैलम् । कफजवृद्धौ भिन्नायां व्रणशोधनार्थमुपयुज्यते ( सुचि. १९.१२-१४ )
सुमनादि तैल–व्रणशोधन करणारे तेल; जाईची पाने, बिबा, अंकोळ, सातवीण, ह्या द्रव्याना वाटून काढा केल्यावर त्यात सिद्ध केलेले तेल. कफज अंडवृद्धि फुटल्यास व्रणशोधनासाठी उपयोगी.

**सुमनाह्वय**–न., खनिज० कांस्यम् ( रा.१३.२४;पृ. २१० )
कासे.

**सुमालिन्**–पु., वनस्पति० भूस्तृणम् ( रापरि. ८.४२;पृ. ३६०; रा.८.७२; पृ. १४३ )
रोहिसगवत.

**सुमुख**–पु., वनस्पति० पर्णासभेदः द्र० 'वनबर्बरिका' गुणाः– अयं सुगन्धो नातिकटुको दोषोत्क्लेशकरो रोचनश्च ( चसू. २७.१७३ ) कटुरुष्णः सुगन्धिः कफवातघ्नः पार्श्वशूलविषश्वासकासदौर्गन्ध्यवान्तिभूतहरश्च ( ध. ४.५८; पृ. १४५ )
हिं.—वनबबरी.
**म.—सुगन्ध आजवला.**
बं.—वनबाबुइ तुलसी.
ता.—एलुमिच्चं तुळचि.
रान तुळस, अजवला. **गुण**—सुगंधी, थोडा तिखट, रुचकर, दोषांचा उत्क्लेश करणारा, उष्ण, कफवात नाशक; फासळ्यातील शूळ, विष, श्वास, खोकला, दुर्गंधी, वांती, भूतबाधा नाशक.
पु., वनस्पति० तुलसीभेदः द्र० 'तुलसी' ( सुसू. ४६.२३३-३४; चक. १.२५; सुसू. ३८.१८-१९ )
तुळशीचा प्रकार. पहा 'तुळशी.'
बर्बरः ( रापरि. १०-४८; पृ. ३७२ ) अजवला.
सितार्जकः ( रा. १०.८५; पृ. १४५ )
पांढरा अजवला.

**सुमुखागत**–वि., मुखपरंपरागतः ( र. ५.१४४ )
तज्ज्ञांकडून मुखपरंपरेने कळलेला अनुभव.

**सुमुष्टि**–पु., वनस्पति० विषमुष्टिः ( रापरि. ४.३९; पृ. ३३८ )
कुचला, जहरी कुचला.

**सुमूल**–पु., वनस्पति० श्वेतशिग्रुः द्र० 'शिग्रु' ( रा. ७.६४; पृ. १४२ )
पांढरा शेवगा.

**(सुमूला)**–स्त्री., वनस्पति० शालिपर्णी ( रा. ४.११५. पृ. २३ )
सालवण.

**सुमूलक**–न., वनस्पति० गर्जरम् ( रा. ७.९८; पृ. १४७ )
गाजर.

**सुमेघनाद**–वनस्पति० मेघनादस्तण्डुलीयो वा ( र. ११.१०८ )
तांदुळजा.

**सुर्**–पु., भूताधिपतिविशेषः ( असंउ. ७ )
भूतांचा एक अधिपति.
वनस्पति० देवदारुः ( र. ११.९०–९२ )
देवदार.

**(सुरा–)**स्त्री., आसुत० अनुद्धृतमण्डा, असौ कृशसक्तमूत्रग्रहण्यर्शोविकारिणां हिता, स्तन्यरक्तक्षयेषु प्रशस्ता,

**वातघ्नी च** (चसु. २७.१७९) **गुणाः-सुस्वादुस्तिक्ता कटुरम्ला सकषायोष्णा तीक्ष्णा रूक्षा सूक्ष्मा लघुः दीपनरोचनतुष्टिपुष्टिहृद्यसरस्वरवर्णकरी, रक्तपित्त-दूषणमूत्रशोधनकरी, वातकफघ्नी, शूलाऽनिद्राऽतिनिद्राकासाऽर्शोग्रहणीश्वासप्रतिश्यायहरा च** (ध. ६.२५५ पृ. २५१; सुसू. ४५.१७८-१७९; अहसू. ५.६७) **श्रमहराणां श्रेष्ठा** (चसू. २५.४०) **कृशानामनुपानार्थमुपयुज्यते** (सुसू. ४६.४२९)

दारू. (मंड न काडलेली) गुण- कृशता लघ्वी अडणे, ग्रहणी, अर्श ह्या विकारात हितकर. अंगावरचे दूध व रक्तक्षयात हितकर, पाहिजे तशी गोड, कडु, तिखट, आंबट, थोडी तुरट, उष्ण, तीक्ष्ण, रूक्ष, सूक्ष्म, हलकी, दीपक, रोचक, तुष्टिपुष्टिकर, सारक, स्वर, वर्ण करणारी, हृदयाला हितकर, रक्तपित्त दूषक, मूत्र शोधक, वातकफघ्न; शूल, खोकला, मूळव्याध, श्वास, पडसे हारक; झोप आणणारी व झोप कमी करणारी. कृशांना अनुपान म्हणून उपयुक्त. श्रमहारक द्रव्यात श्रेष्ठ.

**परिपक्वान्नसन्धानसमुत्पन्नां सुरां जगुः** (चसू. २७.३२३)

शिजलेल्या अन्नापासून आसव पद्धतीने सुरा होते.

**पैष्टी पिष्टभवा सुरा** (सुउ. ४२.६४-६५)

पिठाची दारू.

**काललवणयुक्ता सुरा वातशूले प्रशस्ता** (सुउ. ४२.९२)

संचळ घातलेली दारू. वातशूलावर चांगली.

**शालिपिष्टकृतो मद्यः** (सुसू. ४५.१७५-१७६)

तांदळाच्या पिठाचे मद्य.

**-काष्ठ**-न., **वनस्पति० देवदारुः** (सुउ. ११.६)

देवदार.

**-कृता**-स्त्री., **वनस्पति० गुडूची** (रा. ३.१; पृ. ८)

गुळवेल.

**सुरसा** (र. २७.५२) तुळस.

**-तुङ्ग**-पु., **वनस्पति० सुरपुन्नागः** (रापरि. १०.१०; पृ. ३६८)

देवपुन्नाग. सुरपीण.

**-दारु**-पु., **वनस्पति० देवदारुः** (चसू. ३.८)

देवदार.

**महाकषायवर्गे स्तन्यशोधनगणे एकं द्रव्यम्** (चसू. ४.१२)

महाकषायवर्गातील एक द्रव्य.

**अनुवासनोपगगणे एकं द्रव्यम्** (चसू. ४.१३; ध. १.७७; पृ. २१)

स्नेहबस्तीला उपयुक्त गणातील एक द्रव्य.

**वृक्ष० सरलदेवदारः, देवाह्वः** (सुचि. १७.४४)

सरळ देवदार, देवदार.

**-दालिका**-स्त्री., **वनस्पति० देवदाली** (र. १८.७२-७३)

देवडांगरी.

**-दाली**-स्त्री., **वनस्पति० देवदाली** (र. ५.१५१)

देवडांगरी.

**-द्रुम**-पु., **वनस्पति० देवदारु, अपस्मारशमने सिद्धार्थघृते उपयुक्तम्** (सुउ. ६१.३१)

देवदार. अपस्मारनाशक. सिद्धार्थघृत नामक औषधी तुपात उपयुक्त.

**महानलः** (ध. ४.१४२; पृ. १६२) देवनळ.

**-धूप**-पु., **निर्यास० रालः** (रा. १२.१७७; पृ. ११९)

डिंक, राळ.

**-ध्वज**-पु., **शक्रध्वजः, इन्द्रधनुः** (चइ. १२.७२)

इंद्रधनुष्य.

**-नाल**-पु., **वनस्पति० महानलः** (ध. ४.१४२; पृ.१६२)

मोठा नळ.

**-पर्ण**-न., **वनस्पति० पलाशः** (रापरि. १०.५०; पृ. ३७२)

पळस.

(**-पर्णी**)-स्त्री., **वनस्पति० पलाशी** (रा परि. ३.४९; पृ. ३३३)

लांब व आंबट पानाची वेल.

**-पर्णिका**-स्त्री., **वनस्पति० सुरपुन्नागः** (रा परि. १०.१०; पृ. ३६८)

देवपुन्नाग.

**-पुन्नाग**-पु., **वनस्पति० सुरपर्णिका, गुणाः-मधुरः, शीतः, सुगन्धिः, देवताप्रसादनकरः, पित्तनाशनः, भूतविद्रावणश्च** (रा परि. १०.१०; पृ. ३६८)

देवपुन्नाग. गुण— गोड, थंड, सुगंधी, पित्तनाशक, भूत-बाधानाशक, देवता प्रसन्न करणारा.

**-पुष्पी**-स्त्री; **वनस्पति० अजगन्धा** (रा. ४.१५३; पृ. ९०) तिळवण.

**-प्रिय**-पु., **वनस्पति० अगस्त्यः** (रा. परि. १०.१३ पृ. ३६९) हदगा.

**-प्रिया**-स्त्री., वनस्पति० जाती
(रा. १०.२३१; पृ. १९८) जाई.
सुवर्णकदली (रा. ११.११५; पृ. १४९.)
सोनकेळ.

**-मृत्तिका**-स्त्री., खनिज० सौराष्ट्री
(ध. ३.१०६; पृ. ११६) तुरटी.

**-मेदा**-स्त्री., वनस्पति० महामेदा
(रा. ५.१६३; पृ. ३१)
महामेदा. अष्टवर्गापैकी एक.

**-राजबस्ति**-पु., इन्द्रबस्तिः (सुचि. १८.२६)
इंद्रबस्ति. (मर्म).

**-लता**-स्त्री., वनस्पति० ज्योतिष्मती (र. २७.११८)
मालकांगोणी.
तेजोवती (रा. ३.३९२; पृ. ६१)
मालकांगोणीचा प्रकार.

**-वल्लभा**-स्त्री., वनस्पति० श्वेतदूर्वा
(रा. ८.२३०; पृ. १६३.) पांढरी दूर्वा.

**-वारुणी**-स्त्री., वनस्पति० इन्द्रवारुणी
(र. २४.१४०) इंद्रवारुणी, कवंडळ, कडु इंद्रावण.

**-श्रेष्ठा**-स्त्री., वनस्पति० ब्राह्मी
(रा. ५.१४७; पृ. १५४) ब्राह्मी.

**-संभवा**-स्त्री., वनस्पति० सुवर्चला
(रा. ४.१४४; पृ. १५३) सूर्यभक्ता.

**-सर्षपक**-पु., वनस्पति० देवसर्षपकः
(रापरि. ९.४२; पृ. ३६७)
देवमोहरी.

**सुरक्तक**-पु., वनस्पति० क्षुद्राम्रः (ध. ५.९; पृ. १७०)
रान आंबा.
न., सुवर्णगैरिकम् (रा. १३.२३३; पृ. १२९)
सोनकाव. सोनगेरू.

**सुरङ्ग**-पु., वनस्पति० नारङ्गः (रा. ११.२४; पृ. १७३)
संत्रे.
न., खनिज० हिङ्गुलम् (रा. १३.४७; पृ. २१५)
हिंगूळ.

**( सुरङ्गा )**-स्त्री., वनस्पति० कैवर्तिका
(रा परि. ३.३५; पृ. ३.३२)
एक वेल.

**( सुरङ्गी )**-स्त्री., वनस्पति० काकनासा
(ध.४.२५; पृ. १३९)
कावळी, एक प्रकार.

**-द**-न., वनस्पति० कुचन्दनम्
(रा.१२.१२; पृ. ९४)
तांबडे चंदन, रक्तचंदन.

**-धातु**-पु., खनिज० गैरिकम्
(रा. १३.२३१; पृ. १२८)
गेरु, काव.

**सुरङ्गक**-पु., वनस्पति० कुचन्दनम्
(ध. ३.६; पृ. ९४)
रक्तचंदन.

**( सुरङ्गिका )**-स्त्री., वनस्पति० पोतकी
(ध. परि. ४.५; पृ. १६८)
पोईची भाजी.

**सुरटी**-स्त्री., खनिज० वङ्गम् (ध. ६.१३; पृ. २०८)
कथील.

**सुरत**-न., स्त्रीसंभोगः (र. १.६२) स्त्रीसंभोग, मैथुन.

**सुरभि**-पु., वनस्पति० तुलसी (सुसू. ४६.२३३)
तुलसी.
गन्धतृणम् (रापरि. ८.४४; पृ. ३६०)
रोहिसगवतप्रकार.
स्त्री., वनस्पति० सुरसा (रा. १०.७८; पृ. १४४)
तुळस.
रुद्रजटा (रापरि. ३.२४, पृ. ३३१) शिवजटा.
पाची (रापरि. १०.४६; पृ. ३७१) मरवा.
सल्लकी (अहसू. २०.३७; ध. ३.१३५; पृ. १२२)
साळई.
बर्बरिकम् (रा. १२.१७; पृ. ९५) चंदनप्रकार.
मुरा (ध. ३.३७; पृ. १०९) मूर्वा.
बकुलः (रा. १०.२६२; पृ. २०२) बकुळ.
शमी (रा. ८.१५२; पृ. १८८) शमी.
चम्पकः (ध. ५.१४२, पृ. १९९) चाफा.
कदम्बः (रा. ९.१७०; पृ. १९०) कळंब.
प्राणि० गौः (सुउ. ५७.९; र. ३०.६८) गाय.
निर्यास० रालः (र. १८.२१-२८; रा. १२.१७७)
राळ.
गन्धशालिः (रा. १६.९३; पृ. २२१)
सुगंधी साळ.
ग्रैष्मी (ध. ५.१४०; पृ. १९८) रानमोगरी.
वि., सुगन्धिः (सुसू. ४६.३४६) सुगंधी.

**-गन्ध**-न., वनस्पति० तमालपत्रम्
(रा. ६.८०; पृ. ८०) तमाल पत्र.
पु., खनिज० गन्धकः (र. २२.१६७) गंधक.

–( **गन्धा** )–स्त्री., **वनस्पति० जाती**
( रा. १०.२३१; पृ. १९८ ) जाई.

–**त्रय**–न., **खनिज० हरितालमनःशिलागन्धकाश्चेति त्रयाणां समूहः** ( र. २१.१६१ )
हरताळ, मनशीळ, गंधक यांची त्रयी.

–**त्वक्**–स्त्री., **वनस्पति० भद्रैला** (रा. ६.७०; पृ. ७९)
मोठी वेलची.

–**पत्रा**–स्त्री., **वनस्पति० जम्बूः** (ध. ५.८३; पृ.१८५)
जांभूळ.

–**स्रवा**–स्त्री., **वनस्पति० सल्लकी**
(रा. ११.१९५; पृ. १२२) सालई.

**सुरभी**–स्त्री., **वनस्पति० पर्णासभेदः**
( चक्र. चचि. २३.२४३ ) तुळशीचा प्रकार.
**वनस्पति० शूकशिम्बा** ( चसू. ५.६५ ) **जम्बूः**
( ध. ५.८३; पृ. १८५ ) जांभूळ.
**तुलसी** ( ध. ४.५०; पृ. १४४ ) तुळस.

**सुरम्भिका**–स्त्री., **वनस्पति० सुवर्णकदली**
( रा. ११.११४; पृ. १४९ ) सोनकेळ.

**सुरस**–पु., **वनस्पति० तुलसीभेदः द्र० 'तुलसी'**
**गुणाः– पित्तकृत् कफवातघ्नः पूतिगन्धहा हिक्काकासविषश्वासपार्श्वशूलविनाशनः** (चसू. २७.१६९; सुसू. ४६.२३३; र. १२.४०-४१ )
तुळशीचा प्रकार. गुण— दुर्गंधी नाशक, कफवातनाशक, उचकी, खोकला, विष. श्वास, फासळ्यातील शूलनाशक, पित्तकर.
**गन्धतृणम्** ( रापरि. ८.४४; पृ. ३६० )
रोहिसगवत प्रकार.
**निर्यास० मोचरसः** ( रा. ८.२१५; पृ. १९६ )
मोचरस. सावरीचा डिंक.
**कणगुग्गुलुः** (रा. १२.१८६; पृ. १२०) सोनगुग्गूळ.
स्त्री., **वनस्पति० तुलसी** ( असंउ. ४२ ) तुळस.
न., **वनस्पति० त्वक्** ( रा. ६.७६; पृ. ७९ )
दालचिनी.
**निर्यास० बोलम्** ( रा. ६.११६; पृ. १०८ ) बोळ.

( **सुरसा** )–स्त्री., **वनस्पति० तुलसी**
(ध. ४.५०; पृ. १४४; चवि. ७.१७; सुउ. ६२.३०)
**अस्या रसो नेत्ररोगेषूपयुज्यते** ( असंउ. २० )
तुळस. हिचा रस नेत्ररोगात उपयोगी आहे.
**मिश्रेया** ( रा. ४.६; पृ. ६९ ) बडीशेप.
**मूर्वा** ( इन्दु. असंउ. २८ ) मोरवेल.
**ब्राह्मी** ( रा. ५.१४८; पृ. १५४ ) ब्राह्मी.
**रास्ना** ( रा. ६.३९६; पृ. ६२ ) रास्ना.

( **सुरसी** )–स्त्री., **वनस्पति० श्वेतनिर्गुण्डी**
( सुसू. ३८.१८ ) पांढरी निर्गुडी.

–**पत्रक्षार**–पु., **सुरसापत्राणि दग्ध्वा कृतः क्षारः** ( चचि. १८.१७१ )
तुळशीच्या पानांचा ती जाळून केलेला क्षार.

–**पुष्प**–न., **वनस्पति० तुलसीमञ्जरी** ( र. २७.११९)
तुळशीची मंजरी.

–**प्रसव**–न.,**वनस्पति० सुरसमंजरी** (इन्दु. असंउ.४४)
तुळशीची मंजरी.

–**मञ्जरी**–स्त्री., **पर्णासभेदः** ( चक्र. चचि. २३.१०१ )
तुळशीचा प्रकार.

**सुरसाग्रज**–न., **वनस्पति० सुरसपुष्पम्** ( इन्दु. असंउ. ४३ )
तुळशीचे फूल. कोवळा देठ.
**तुलसीपल्लवम्** ( सुक. ८.६८ ) तुळशीचे पान.

**सुरसादिकषाय**–पु., **द्रव्यकषायः आस्थापनार्थमुपयुज्यते** ( सुचि. ११.७ )
तुळस इत्यादीचा काढा. निरुह बस्तीला उपयुक्त.

**सुरसादिगण**–पु., **द्रव्यगण० सुरसा श्वेतसुरसा फणिज्झकार्जकभूस्तृणसुगन्धकसुमुखकालमालकुठेरककासमर्दक्षवकखरपुष्पविडङ्गकट्फलसुरसीनिर्गुण्डीकुलाहलोन्दुरुकर्णिकाफञ्जीप्राचीबलकाकमाच्यो विषमुष्टिकश्चेति** ( सुसू. ३८.१८-१९ )
तुळस इत्यादीगण— काळी तुळस, पांढरी तुळस, मर्वा, अजवला, रोहिसगवत, द्रोणपुष्पी ( मोठे सुगंधी तृण), मोहरी, काळा अजवला, वडाच्या पानाप्रमाणे पण लहान पाने असून बेलासारखा वास येणारा अजवला. (क्षुद्र तुळस). कासविंदा, नाक शिंकणी, व तिचा दुसरा प्रकार, वावडिंग, कायफळ, पांढरी व काळी निर्गुडी, मुंडी, उंदीरकानी, भारंगी, काकजंघा, कावळी, बकाणनिंब.

**सुरा**–स्त्री., **शालिपिष्टकृतं मद्यं** ( अहृसु. ५.६७ )
साळीच्या पीठाचे मद्य.

–**कल्प**–पु., **आसुत० माषशालिपिष्टकृतं वैरेचनिकमूल भावितं मद्यम्, लोहितवर्णा पिष्टकिण्वकल्केन किञ्चित्कलुषा** ( ड. सुसू. ४४.३१-३४ )
रेचक मुळांच्या काढ्याची भावना दिलेल्या तांदुळाच्या व उडदाच्या पिठाची केलेली दारू. ही लालरंगाची गढूळ असते ( पिठाचे कण असल्याने )

**-कोष्ठी**-स्त्री., मद्यनिर्माणाय कृता कोष्ठी ( र. ७.६ )
दारू करण्याकरिता केलेली कोठी.

**-मण्ड**-पु., न., सुरायाः उपरितनोऽच्छो भागः ( ड. सुउ. २८.४ )
दारूच्या वरचा स्वच्छ भाग.

**-मेह**-पु., रोग० कफजोऽयम्, अस्मिन्नरः सुरातुल्यमुपरि प्रसन्नमधः सान्द्रं मेहति (असंनि. १०.१३) अस्मिन् निम्बकषाय उपयुज्यते ( सुचि. ११.९; सुनि. ६.१० )
कफज मेह. या मेहात खाली दाट वर पातळ असे सुरेसारखे लघ्वीला होते. यांत कडुनिंबाचा काढा योजतात.

**सुराख्य**-न., वनस्पति० देवदारुः ( सुउ. ४१.४८ )
देवदार.

**सुरानन्द**-पु., रसाचार्येषु सप्तविंशतिसंख्याकेष्वन्यतमो रससिद्धिप्रदायकः ( र. १.२-५ )
रसशास्त्रातील २७ तज्ञांपैकी एक आचार्य.

**सुरायस**-न., खनिज० कान्तलोहम् ( र. १५.६८ )
कांतलोह.

**सुराह्व**-न., वनस्पति० हरिचन्दनम् ( रा. १२.१९;पृ. ९५ )
पिवळे चंदन.

**सुराह्वक**-पु., वनस्पति० बर्बरः (रापरि.१०.४८;पृ.३७२)
रानतुळस, आजवला.

**सुरालय**-पु., देवगृहम् ( अहसू. २.३८ ) देवघर.

**सुराला**-स्त्री.,वनस्पति० अतिविषा (इन्दु. असंउ. ४४; अहसू. १५.४)
अतिविष.

**सुराष्ट्रक**-पु., धान्य० कुलित्थः ( ध, ६.१०५; पृ. २२८ )
कुळीथ.

**सुराष्ट्रज**-पु., धान्य० मुद्गः ( रा. १६.१२९; पृ. २२४ )
मूग.

**( सुराष्ट्रजा )**-स्त्री., खनिज० सौराष्ट्री ( ध. ३.१०५; पृ. ११६ )
तुरटी.
**तुवरमृत्तिका** ( सुचि. १.६० ) तुरट माती, तुरटी.

**सुराष्ट्रोद्भवा**-स्त्री., खनिज० सौराष्ट्रिका (सुचि. २५.३८)
सुराष्ट्र-काठेवाडमध्ये होणारी, तुरटी.

**सुरासव**-पु., आसुत० तीव्रमदो वदनप्रियो वातघ्नश्च । यस्मिन्नासवे जलस्थाने सुरा एवोपयुज्यते, स सुरासवः ( चसू. २७.१८७ ) सुरया सूयते तोयकार्यं क्रियते यस्मिन् सः ( सुसू. ४५.१८७ )
सुरेच्या-दारूच्या सहाय्याने पाण्याच्या ऐवजी सुरा घालूनच जे आसव केले जाते ते सुरासव.

**सुराह्व**-पु., वनस्पति० हरिद्रुः ( रापरि. ९.२६; पृ.३६६)
पिवळ्या गाभ्याचा चांगल्या फुलांचा पिवळा वृक्ष.
**देवदारुः** ( चसू. ३.३; ध. १.७६; पृ. २१ )
देवदार.

**सुरूप**-न., वनस्पति० तूलम् ( रा. ९.८६;पृ. १८१ )
पिंपळाच्या झाडासारखा वृक्ष, सतूक.

**( सुरूपा )**-स्त्री., वनस्पति० वार्षिकी ( ध. ५.१३६;पृ. १९७ )
तीन पुडांची त्रिकोणी वनस्पती. त्रायमाण.
**शालिपर्णी** ( रा. ४.११५; पृ. २३ ) सालवण.
**भार्ङ्गी** ( रा. ६.९६; पृ. २० ) भारंगमूळ.

**सुरेचन**-पु., योग० अष्टौ भागा निस्तुषजयपालस्य, शुण्ठ्यास्त्रयो, मरिचगन्धकाभ्यां द्वौ द्वौ, टंकणादेकः पारदाच्चैक इत्येतेषां मर्दनाज्जायते । मात्रा-गुञ्जा । अनुपानम्-शीताम्बु । फलम्-गुल्मजलोदरप्लीहनाशः ( र. १९.६ )
जयपाळ ८ सुंठ ३ मिरी २ गंधक २ टाकणखार १ पारा १ यांचा खलून केलेला योग. मात्रा- एक गुंज. अनुपान- थंड पाणी. गुण- गुल्म, जलोदर, प्लीहा नाशक.

**सुरेज्या**-स्त्री., वनस्पति० ब्राह्मी ( रा. ५.१४८; पृ. १५४ ) ब्राह्मी.
**सुरसा** ( रा. १०.७७; पृ. १४४ ) तुळस.

**सुरेन्द्र**-न., सुवर्णम् कुटजमित्यन्ये, वाद्यप्रलेपार्थमुपयुज्यते ( ड. सुक. ३.१४-१५ )
सोने, कुडा. वाद्याला लेप देण्यास उपयुक्त.

**सुरेन्द्रकन्द**-पु., वनस्पति० वज्रकन्दः (सुसू.४६.३०५)
वज्रकंद, शकरकंद.

**सुरेशलुप्त**-न., रोग० क्षुद्रकोष्ठरोगः, इन्द्रलुप्तम् ( चसू. ३.७ )
इंद्रलुप्त, चाई, एक क्षुद्र कुष्ठरोग.

**सुरेश्वर**-पु., इन्द्रः ( चसू. १.२१ ) इंद्र.

**सुरेष्ट**-पु., वनस्पति० वसुकः (रापरि. ५.३७; पृ.३४३)
वसु, तांबडी व पांढरी फुले येणारा असे दोन प्रकार.

सुरपुन्नागः ( रापरि. १०.१०; पृ. ३६८ )
देवपुन्नाग. सुरपीण.

**सुरेष्टक**–पु., निर्यास० सर्जकः (रा. ९.२०५; पृ. १९४)
राळ, डिंक.

**सुलघु**–वि., नितरां लघु सुपचत्वेन अगुरु यथा पुराण-रक्तशाल्यादि ( ड. सुउ. ३९.१४५ )
पचनाला अतिशय हलके. जसे जुनी तांबसाळ इ०

**सुलङ्घित**–वि., सम्यग्लङ्घनवान् ( पुरुषः ) ( सुउ. ३९.१०४-१०५ )
योग्य प्रमाणात लंघन केलेला ( मनुष्य. )
सुङ्घितस्वरूपम्–अधःप्रवृत्तवातपुरीषमूत्रः, बुभुक्षा-तृड्सहः, अङ्गगौरवादिरहितः प्रसन्नान्तःकरणः, प्रसन्नेन्द्रियः सर्वाक्षमः एवं लक्षणको नरः सर्वान् लङ्घनगुणान् सम्यगाप्तवानिति ज्ञेयम् ( सुउ. ३९.१०४-१०५ )
चांगल्या लंघनाची **लक्षणे**–वात, मूत्रमळांची योग्य प्रवृत्ती. भूक, तहान सहन न करवणे, अवयवांना जडत्व नसणे, प्रसन्न इंद्रिये आत्मा असणे, काहीही सहन न होणे.

**सुलभा**–स्त्री., वनस्पति० धूम्रपत्रा ( रा. परि. ५.८; पृ. ३४० )
धुरकट पानाची एक वनस्पती.
माषपर्णी ( रा. ३.१७२; पृ. ३२ ) रानउडीद.
वार्षिकी ( रा. १०.२२९; पृ. १९८ )
तीन पुडांची त्रिकोणी वनस्पती; त्रायमाण.

**सुललितचक्षुस्**–वि., किञ्चिन्मिलितलोचनः ( ड. सुउ. २७.८ )
अर्धोन्मीलित डोळ्याचा. किंचित झाकलेल्या डोळ्याचा.

**सुलोमन्**–स्त्री., वनस्पति० ताली ( रा. परि ३.३७; पृ. ३३२ )
लव असलेली बारीक तांबडी वेल.

**सुलोमा**–स्त्री., वनस्पति० मांसी ( रा. १२.१३९; पृ. १५३ )
जटामांसी.

**सुवंश**–पु., वनस्पति० श्वेतेक्षुः ( रा. १४.१८१; पृ. १५८ )
पांढरा ऊस.

**सुवक्त्र**–पु., वनस्पति० सुमुखः (ध. ४.५८, पृ. १४५)
पांढरा अजवला.

**सुवदन**–पु., वनस्पति० सुमुखः ( ध. ४.५८; पृ. १४५)
सुंदर मुख. चांगले तोंड.

**सुवर्च**–पु., खनिज० सर्जिकाक्षारः (ध. २.२०; पृ. ७२)
सज्जीखार.

**सुवर्चल**–न., क्षार० संचलम् ( र. १८.१८५ )
संचळ.

**( सुवर्चला )**–स्त्री., वनस्पति० आदित्यभक्ता ( सुसू. ४६.२६२, चचि. १९.३२ ) सूर्यावर्त ( सुसू. ३७.३० )
सूर्यभक्ता नावाची वनस्पती.
ब्राह्मी ( रा. ५.१४७; पृ. १५४ ) ब्राह्मी.

**सुवर्चिक**–पु., खनिज० सर्जिकाक्षारः (ध. २.२०; पृ. ७२)
सज्जीखार.

**( सुवर्चिका )**–स्त्री., खनिज० सर्जिकाक्षारः (चसू. २.२३; सुचि. ६.१२) सज्जीखार.

**सुवर्ण**–न., खनिज० पार्थिवद्रव्येष्वेकं, हिरण्यम् (चसू. १.७०) त्रप्वादिगणे एकम् (सुसू.३८.६२) गुणाः–स्वादु हृद्यं बृंहणीयं रसायनं दोषत्रयापहं शीतं चक्षुष्यं विषसूदनं च ( सुसू. ४६.३२६ ) स्निग्धं कषायं च ( असंसू. १२.१२ ) रुच्यचक्षुष्यायुष्यकरं प्रज्ञाकरं वीर्यकरं स्वर्यं कान्तिकरं च ( ध. ६.१; पृ. २०५ ) तस्य शोधनम्–सैन्धव-गैरिकेण सह सुवर्णपत्राणि कर्षप्रमाणानि शराव-रुद्धं कृत्वा प्रहरार्धपर्यन्तं ध्मापयेत्। एवं सुवर्णं पूर्णवर्णं भवति ( र. ५.१५ ) तस्य मारणम्– प्रथमतः कण्टकवेध्यानि सुवर्णपत्राणि कृत्वाऽनन्तरं तानि पत्राणि बीजपूररसमर्दितेन पारदभस्मना लेपयेत्। ततः दशसंख्याकानि कुक्कुटपुटानि दातव्यानि। एभिर्दशपुटैः सुवर्णं म्रियते ( र. ५.१७ ) गुणाः–आयुष्करं स्मृतिकर-मखिलव्याधिविध्वंसि भूतावेशप्रशान्तिकरं गरहरं मेहापहारि स्फुटमतिकरं वीर्यप्रवर्धनं स्निग्धं मेध्यं बृंहणं वृष्यमग्र्यं यक्ष्मोन्मादप्रशमनपरं मेधाबुद्धि-करं रुच्यं दीपनं स्वादुपाकं च ( र. ५.१२-१३ ) सुवर्णभस्म द्विगुञ्जोन्मितं त्रिकटुसर्पिर्भ्यां लिह्यात्। सुवर्णजमेतद्भस्म कटुघृतोपेतं द्विगुञ्जोन्मितं लीढं सन्नृणां क्षयाग्निसदनं श्वासं कासमरुचिं च हन्ति। एतच्चौजोधातुविवर्धनं बलकरं पांड्वामयध्वंसनं पथ्यं सर्वविषापहं गरहरं दुष्टग्रहण्यादिनुच्च

( र. ५.२० ) **अशुद्धसुवर्णं नराणां बलं वीर्यं च हरति, काये रोगव्रजं कोपयति। असौख्यकरमपथ्यमेतत्सदोषं मरणं करोति** ( र. ५.२३ ) **तस्य द्रुतिविधानम्–सुवर्णं बहुकालपर्यन्तं मण्डूकास्थिवसाटङ्कहयलालेन्द्रगोपकानां प्रतीवापेन द्रवरूपं तिष्ठति। देवदालीफलद्रवैर्भावितं सुवर्णसमानमिन्द्रगोपचूर्णं सुवर्णं जलवत् द्रुतं द्रवरूपं वा करोति** ( र. ५.२१-२२ ) **वेधजं सुवर्णम्–पारदवेधेन संजातं सुवर्णम्** ( र. ५.११ ) **असम्यक् मारितं शोधितं च सुवर्णं सौख्यं वीर्यं बलं च हन्ति रोगसमूहं च करोति** ( र. ५.१४ )

सोने. एक पार्थिव द्रव्य. कथील इत्यादि गणातील एक द्रव्य. गुण— गोड, तुरट, थंड, स्निग्ध, हृदयस्वर–डोळे व रुचीला हितकर; बुद्धि, वीर्य, कांती वाढविणारे; विषनाशक, धातुपरिपोषक, पौष्टिक, त्रिदोषनाशक. **शुद्धि**— सैंधव, गेरू, सोन्याच्या १ तोळा पत्र्याला लावून परळात घालून, दीड तास अग्नि द्यावा. यामुळे सोने पूर्ण वर्णाचे सुरेख होते. **मारण**— काढ्याने भोक पडेल इतके पातळ सोन्याचे पत्रे घेऊन त्याना महाळुंगाच्या रसात पाऱ्याचे भस्म खलून त्याचा लेप द्यावा. नंतर दहा कुक्कुटपुटे द्यावी. म्हणजे भस्म होईल. गुण— पचल्यावर मधुर, स्निग्ध, अग्निदीपक, आयुष्य, बुद्धि, धारणाशक्ति, वीर्य वाढविणारे; श्रेष्ठ, शुक्रवर्धक, पौष्टिक, रुचि, ओज, बल वाढविणारे; क्षय, उन्माद, प्रमेह, भूतबाधा, कृत्रिमविष पांडु व सर्व रोगनाशक. अनुपान व प्रमाण– दोन गुंजा; सुंठ, मिरी, पिंपळी व तूप यांबरोबर चाटावे. म्हणजे क्षय, अग्निमांद्य, ग्रहणी, श्वास, खोकला व बेचव नाहीशी होतात. पांडुरोगनाशक, सेवन करणे हितावह, सर्व विषनाशक आहे. **अशुद्ध सोन्याचे गुण**— बळ, वीर्य हरण करते; रोग समुदाय दुःख करणारे, अपथ्यकर व मरणदायी. **पातळ स्वरूपाचे सोने ( द्रुति ) करण्याची रीति**— बेडकाचे हाड, वसा, टांकणखार, घोड्याची लाळ, मृगकिडे, यांचे चूर्ण सोने पातळ करून त्यात टाकले असता ते पुष्कळ दिवस पातळ राहते. मृगकिड्यांचे चूर्ण देवडांगरीच्या फळाच्या काढ्याच्या भावना देऊन ते सोन्याइतकेच पातळ सोन्यात टाकल्याने ते तसेच पातळ रहाते. योग्य शुद्धि व मारण न केलेले सोने, वीर्य बल आरोग्य, नष्ट करते व अनेक रोग उत्पन्न करते. **वेधज सोने**— पाऱ्याच्या वेधाने झालेले सोने.

**मान० द्रंक्षणद्वयमितो मानविशेषः, कर्ष इति यावत्** (चक.१२.९०) **कर्षः** (ड. सुचि. ३१.७; असंक. ८) एक तोळा, दोन द्रंक्षण.

**खनिज० सुवर्णगैरिकम्** ( सु. उ. ४५.३९ ) सोन काव, सोना गेरू.

**वनस्पति० नागकेसरम्** ( रा. ६.७४; पृ. ७९ ) नागकेशर.

**वनस्पति० कणगुग्गुलुः** (रा. १२.१८६; पृ. १२०) गुग्गुळु, गुग्गुळ. पिवळा ( सोन ) गुग्गुळ

( **सुवर्णा** )–स्त्री., **वनस्पति० सर्वक्षीरी** ( रा. ५.३६५; पृ. ५७ )
सुवर्णक्षीरी, पिसोळा, पिवळा धोतरा.

**इन्द्रवारुणी** ( रा. ३.३७१; पृ. ५८ )
कवंडळ, इंद्रावण.

**हरिद्रा** ( रा. ६.७९; पृ. १८ ) हळद.

**–कदली**–स्त्री., **वनस्पति० कदली** ( रा. ११.११४; पृ. १४९ )
सोनकेळ, केळ.

**–कृष्टी**–स्त्री., **खनिज० हेमकृष्टी** ( र. ८.९ )
सोने, पारा व गंधक यांनी अनेकदां मारून पुनः पुन्हा उत्थित केलेले सोंने.

**–केतकी**–स्त्री., **वनस्पति० केतकी** ( ध परि. ५.१; पृ. २०४ ) केवडा, केवडी.

**–क्षीरा**–स्त्री., **वनस्पति० सूर्यमण्डलाकारपुष्पा** ( चचि. १.(४)-७ )
सूर्याच्या मंडला सारख्या आकाराच्या फुलांची वनस्पती. सूर्यफूल.

**–क्षीरिका**–स्त्री., **वनस्पति० सर्वक्षीरी** ( ध. १.२४२; पृ. ५७ )
पिसोळा पिवळा धोत्रा.

**–क्षीरी**–स्त्री., **वनस्पति० अनन्तासदृशपत्रा सेयं विरेचने उपयुज्यते** ( सुसू. ३९.४ )
धमाशाच्या पानासारखी वनस्पती. रेच होण्यास देतात.

**–गैरिक**–न., **खनिज० गुणाः–स्वादु कषायं शीतं स्निग्धं नेत्र्यं रक्तपित्तहिध्मावमिविषरक्तविकारहरं च** ( ध. ३.१७०; पृ. १२८ )

सोनागेरू, सोनकाव. **गुण**–गोड, तुरट, थंड, स्निग्ध, डोळ्याला हितकर, रक्तपित्त उचकी वांती विष व रक्तविकारनाशक.

**–चूर्ण**–न., गरार्ते शर्कराक्षौद्रयुतं लेहार्थमुपयुज्यते (असंउ. ४०)
सोन्याचे चूर्ण, साखर व मध यांबरोबर कृत्रिम विष नाशाकरिता देतात.

**–त्वच्**–पु., वनस्पति० आरग्वधः (अहृसू. २१.१७;)
बहावा.

**–धातु** -पु., खनिज० राजावर्तः (ध. ६.६०; पृ. २१७)
राजावर्त रत्न.

**–नकुली**–स्त्री., वनस्पति० तेजोवती (रा. ३.३९२; पृ. ६१)
मालकांगोणीप्रकार.

**–पुष्प**–पु., वनस्पति० राजतरणी (रा. १०.२४६; पृ. २००)
राजशेवंती.

**–प्राश**–पु., योग० मधुसर्पिर्युतसुवर्णावलेहनम् (कासू. लेहाध्यायः)
सोने घालून तयार केलेला अवलेह. तूपमधाबरोबर चाटावा.

**–माक्षिक**–पु., खनिज० माक्षिकम् (चचि. ७.७१)
सुवर्णमाक्षिक, सोनामाखी.

**–माषक**–पु., मान० मध्यमाः द्वादशधान्यमाषाः (सुचि. ३१.७)
मध्यम बारा उडीद वजन म्हणजे १ सुवर्णमासा.

**–मृत्तिक**–वि., सुवर्णवर्णा मृत्तिका यस्मिन् भूमिभागे विद्यते, सः (देशः) (चसू. १४.४६)
ज्या प्रदेशात पिवळी माती असते असा प्रदेश.

**–मोचा**–स्त्री., वनस्पति० सुवर्णकदली (रा. ११.११४; पृ. १४९)
सोनकेळ.

**–यूथा**–स्त्री.; वनस्पति० यूथिका (ध. ५.१४९; पृ. २००)
जाई.

**–रम्भा**–स्त्री., वनस्पति० सुवर्णकदली (रा. ११.११४ पृ. १४९)
सोनकेळ.



**–लतिका**–स्त्री., वनस्पति० ज्योतिष्मती (ध. १.२६७ पृ. ६१)
मालकांगोणी.

**–शैल**–पु., मेरुपर्वतः (र. २.७९) मेरुपर्वत.

**–सूची**–स्त्री., सुवर्णमयं सीवनशस्त्रम् (सुचि. २९.१)
सोन्याची सुई, शिवण्याचे शस्त्र.

**सुवर्णक**–न., खनिज० पित्तलम् (ध. ६.१८; पृ. २०९)
पितळ.

**(सुवर्णिका)**–स्त्री., वनस्पति० हेमा (रापरि. ३.१३.; पृ. ३३०)
सोन्यासारखी पाने, फुले व दांडा असलेली वेल.

**सुवर्णार**–पु.; वनस्पति० कोविदारः (रा. १०.२९४; पृ. ४७)
कांचनार.

**सुवर्षा**–स्त्री., वनस्पति० वार्षिकी (ध. ५.१३६; पृ. १९७)
तीन पुटांची त्रिकोणी वनस्पती.

**सुवर्ष्मन्**–वि., सुसारः (कर्णः) (इन्दु. असंउ. २२)
चांगला पुष्ट असा कान, चांगल्या आकाराचा कान.

**सुवल्लरी**–स्त्री., वनस्पति० पुत्रदात्री (रापरि. ३.४७; पृ. ३३३)
पांढऱ्या व सुगंधी फुलांची व वाटोळ्या पानांची पुत्र देणारी वनस्पती, हिच्या फुलांच्या माळा गळयात घालतात.

**सुवल्लिका**–स्त्री., वनस्पति० जन्तुका (रा. ३.१२९; पृ. १५१)
चांगली पुष्कळ गाठाळ पानांची वाकडी लांब खाज-कुहिली सारख्या फळांची झाडावर चढणारी बारीक वेल.

**सुवल्लिज**–न., भैषज्य० प्रवालम् (ध. ६.६४; पृ. २१८)
प्रवाळ.

**सुवल्ली**–स्त्री., वनस्पति० बाकुची (ध. १.१६५; पृ. ३८)
बावची.

**सुवसन्त**–पु., वनस्पति० अतिमुक्तकः (ध. ५.१५३; पृ. २०१)
कस्तुरमोगरा.

**(सुवसन्ता)**–स्त्री., वनस्पति० वासन्ती (ध. ५.१३९; पृ. १९८)
वासंती.

**सुवहा**-स्त्री,. वनस्पति० **शेफालिः** ( चवि. ७.२१; रा. ४.१२१; पृ. १५० ) पांढरी निर्गुंडी.

**त्रिवृत्** ( चसू. ४.९ ) तेड.

**रास्ना** ( चसू. ४.११ ) रास्ना.

**गन्धनाकुली** ( सुचि. १७.४०-४१ ) **गोधापदी** ( ड. सुउ. ५१.२३. ध. ४.१०५; पृ. १५५ ) मुंगुसवेल.

**सल्लकी** ( रा. ११.१९५; पृ. १२२ ) सालई.

**हंसपादी** ( रा. ५.१६६; पृ. १५६ ) राजहंस.

**मुसलीकन्दः** ( रापरि. ७.५८; पृ. ३५२ ) मुसळी ( काळी किंवा पांढरी )

**रुद्रजटा** ( रापरि. ३.२४; पृ. ३३१ ) सुगंधी पाने व पुष्कळ पाळी असलेली वनस्पती.

**उत्तमकारिणी** ( इन्दु. असंउ. ४४ ) एक वनस्पती.

**सुवाचिका**-स्त्री., वनस्पति० **अजमोदा** ( रा. ६.१५१; पृ.९० ) अजमोदा ओवा.

**सुवान्त**-वि., **सम्यक् वान्तः ( पुरुषः )** (असंसू. ३.८५) योग्यप्रमाणात वांती झालेला.

**सुवास**-पु., वनस्पति० **कदम्बः** (ध. ५.१०४; पृ. १९०) कळंब.

**सुविभक्त**-वि., **सुव्यक्तः** ( सुसू. ५.८ ) चांगला स्पष्ट दिसणारा व्रण. ज्याचे सर्वभाग स्पष्ट दिसतात असा व्रण.

**-गात्र**-वि., **सुष्ठु पृथग्भूत सकलावयवः** (सुशा.४.७४) स्नायु निरनिराळे दिसणारे अवयव (शरीर). रेखीव अवयवांचे शरीर.

**सुविरेच्य**-वि., **सुखं विरेच्यो नाम विरेचनार्हं सुखविरेकः** ( चसू. १३.६९ ) सुखाने ज्याला रेच होतात तो.

**सुविष्टरा**-स्त्री., वनस्पति० **गुण्डासिनी** ( रा परि. ८.६६; पृ. ३६३ ) गवताच्या पानासारखी मुळांचा गुच्छ असणारी चापट दिसणारी पाण्यात होणारी वनस्पती.

**सुवीरक**-पु., वनस्पति० **एकवीरः** ( रापरि. ८.८; पृ. ३५७ ) एक झाड.

**सुवीरज**-न., खनिज० **अञ्जनम्** ( ध. ३.१५१; पृ. १२५ ) अंजन, सुरमा,

**सुवीराम्ल**-न., आसुत० **मद्यम्** ( ध. ६.२५१; पृ. २५१ ) मद्य, दारू.

**सुवीर्या**-स्त्री., वनस्पति० **शतावरी** ( रा. ४.४४२; पृ. ६७ ) शतावरी.

निर्यास० **नाडीहिङ्गु** ( रा. ६.६४; पृ. ७८ ) एकप्रकारचा हिंग.

**सुवृत्तक**-पु., वनस्पति० **दर्भः** (ध. ४.१३३; पृ. १६१) दर्भ.

**सुवृत्ता**-स्त्री., वनस्पति० **शतपत्री** ( ध. ५.१५१; पृ. २०१ ) शेवंती.

**सुवृत्ति**-स्त्री., वनस्पति० **सूरणः** ( धपरि. ४.६; पृ. १६८ ) सुरण.

**सुवेगा**-स्त्री., वनस्पति० **तेजोवती** ( रा. ३.३९३; पृ. ६१ ) मालकांगोणी. एकप्रकार.

**सुव्रत**-पु., वनस्पति० **वसुकः** ( ध. ४.१९; पृ. १३८ ) पांढरावसु.

**सुशल्य**-पु., निर्यास० **खदिरः** ( रा. ८.३१; पृ. ११ ) खैर.

**सुशाक**-पु., वनस्पति० **तण्डुलीयकः** ( रा. ५.१७५; पृ. १५७ ) तांदुळजा.

**चञ्चुः** ( रापरि. ४.१८; पृ. ३३६ ) लाल एरंड.

न., वनस्पति० **आर्द्रकम्** ( रा. ६.१३३; पृ. ८७ ) आले.

**सुशाकक**-न., वनस्पति० **आर्द्रकम्** ( ध. २.८५; पृ. ८७ ) आले.

**सुशालि**-स्त्री., वनस्पति० **व्रीहिः** ( रा. १६.९९; पृ. २२१ ) भाताचा एक वर्ग.

**सुशाल्यक**-पु., वनस्पति० **व्रीहिः** ( रा. १६.१०४; पृ. २२२ ) भाताचा एक वर्ग,

**सुशिखा**–स्त्री., वनस्पति० बर्हिचूडा
( रापरि. ५.१३; पृ. ३४१ )
मोरशिखा. मयूरशिखा.

**सुशिम्बिका**–स्त्री., वनस्पति० अतिशिम्बी
( रा. परि. ७.९७, पृ. ३५५)
तलवारी सारखी शेंग असलेली वनस्पती.

**सुशीत**–पु., वनस्पति० प्लक्षः (रा. ११.१२५; पृ.१८५)
नांदरूख, पिंपरी.

**सुशीता**–स्त्री., वनस्पति० शतपत्री
( ध. ५.१५१ पृ. २०१ )
शेवंती.

**सुश्रीका**–स्त्री., वनस्पति० सल्लकी–
( रा. ११.१९६; पृ. १२२ )
सालई.

**सुश्रुत**–पु., विश्वामित्रमुनिपुत्रः, प्राचीनः शल्यतन्त्रकर्ता–धन्वन्तरिविश्वामित्रसुताय सुश्रुताय आयुर्वेदमुपदिष्टवानिति गारुडे इति शब्दकल्पद्रुमः, पितुराज्ञया, सुश्रुतः काशीं गतस्तत्र दिवोदासो नाम काशिराजः साक्षाद् धन्वतरिरायुर्वेदविदांवर आसीत्, तस्माद् आयुर्वेदं गृहीतवान्। अनन्तरं सुश्रुताद्याः काशिराजशिष्याः स्वं स्वं तन्त्रं कृतवन्तस्तत्र सुश्रुततन्त्रं गुणवत् सत् "सुश्रुत" इति नाम्ना जगति विख्यातमभूत् ( सुसू. १.३)
सुश्रुत.विश्वामित्र ऋषीचा मुलगा. प्राचीन शल्यतंत्राचा कर्ता. विश्वामित्राच्या मुलाला सुश्रुताला धन्वंतरी आयुर्वेदाचा उपदेश करता झाला. ( गरुड पुराण. ) बापाच्या आज्ञेने सुश्रुत काशीस गेला. तेथे आयुर्वेदज्ञां-मध्ये श्रेष्ठ अशा दिवोदास, काशिराज साक्षात धन्वन्तरीपासून आयुर्वेद शिकला. नंतर त्या काशीराजाच्या सुश्रुतादी शिष्यांनी आपापली तंत्रे केली, सर्वात सुश्रुताचे तंत्र गुणयुक्त म्हणून जगद्विख्यात झाले.

**–संहिता**–स्त्री., सुश्रुतमहर्षिणा कृता शल्यतन्त्रप्रधाना आयुर्वेदीयसंहिताऽस्यां षट्स्थानानि वर्तन्ते–सूत्रस्थानं निदानस्थानं शारीरस्थानं चिकित्सास्थानं कल्पस्थानमुत्तरतन्त्रं चेति । तत्र सूत्रस्थाने षट्चत्वारिंशदध्यायाः, निदाने षोडश, शारीरे दश, चिकित्सिते चत्वारिंशत्, कल्पे अष्टौ, उत्तरतन्त्रे षट्षष्टिरिति ( सुसू. ३.३ ) समाहृत्य शतोत्तरषड्शीतिः
सुश्रुतसंहिता. शल्यतंत्र मुख्य असलेली सुश्रुताने केलेली आयुर्वेदसंहिता. हिची सहा स्थाने. सूत्र, निदान, शारीर, चिकित्सा, कल्प व उत्तर अशी. क्रमाने त्या स्थानात शेहेचाळीस, सोळा, दहा. चाळीस, आठ, व सहासष्ट अध्याय आहेत.एकूण१८६,

**सुश्वेता**–स्त्री., वनस्पति० लक्ष्मणा (ध. १९७. पृ. २५ )
लक्ष्मणा. पांढरी रिंगणी.

**सुषमा**–वि., सुशोभना ( चइ. ७.८ ) सुशोभित.

**सुषवन**–न., ( परिव० ) सहनम् ( चसू. १८.७ )
सहन करणे, सहन.

**सुषवी**–स्त्री., वनस्पति० जीरकः ( ध. २.५९; पृ. ८१ )
जिरे.
शाक० कारवेल्लकम् (चक. १.२२; अहसू. १५.१७)
कारले.
पानीयवल्ली ( सुचि. ५.१२; र.१२.३८ ) एक वेल.

**सुषिर**–पु., दन्तरोग० दन्तमूलेषु जातो रक्तपित्तजो रुजायुक्तो लालास्रावी दन्तमांसप्रशातनश्च यः श्वयथुः, सुषिर इति नाम्ना व्यपदिष्टः (असंउ. २५)
दातांचा रोग. दातांच्या मुळाशी रक्त व पित्त यांनी वेदनायुक्त लाल गळणारी, दातांच्या हिरड्या झरविणारी जी सूज येते ती.

**सु( षिरा )**–स्त्री., वनस्पति० नलिका
( ध. ३.४३. पृ. १०४ )
लाल पानांची पोवळयासारखी पण पोकळ वनस्पती.

**–त्व**–न., सौषिर्यम् ( कासू. २.५ ) पोकळी.

**सुषिराख्य**–पु., वनस्पति० वंशभेदः रन्ध्रयुक्तवंशः
( रा. ७.२१६; पृ. १६२ )
बांबूचा प्रकार. पोकळ बांबू.

**सुषूयन**–( परिव० )–न., सहनम् ( चसू. १८.७ )
सहन करणे.

**सुषेण**–पु., वनस्पति० वेतसः ( ध. ५.११६; पृ. १९३ )
वेतस, जलवेतस.
न., वनस्पति० करमर्दः ( ध. ५.१०२; पृ. १९० )
करवंद.

**सुषेणी**–स्त्री., वनस्पति० त्रिवृत् श्यामा
( ध. १.२४२;पृ. ५७ )
काळे तेड.

**सुसंगुप्त**–वि., अतिशयेनादृश्यम्, पटादिना आच्छादितत्वम् ( सुसू. ४६.४४७ )
अतिशय गुप्त–अदृश्य. वस्त्र इत्यादींनी आच्छादिलेले,

**सुसंस्कृत**-वि., अक्लिष्टवर्णश्रुतिकम् ( सूत्राक्षरम् ) ( सुस्. ३.५४ )
उच्चाराला कष्ट होणार नाही अशी अक्षरे ऐकण्यास आली पाहिजेत अशी. सहज व स्पष्ट शब्द उच्चार. कानांना त्रासदायक न वाटणारे शब्दोच्चार.

**-बन्ध**-पु., पारदबन्धः, विष्णुक्रान्ताद्यौषधैरप्रसूतायाः गोर्मूत्रेण पिष्टो वालुकायन्त्रे पाचितो लोहादिभिर्मर्दितः पुनरपि वालुकायन्त्रे पक्वः पारदः ( र. ११.९०-९२ )
पाऱ्याचा एक बंध. विष्णुकांता इत्यादी औषधांनी कालवड गाईच्या मूत्राने घोटलेला वालुकायंत्रात अग्नि दिलेला लोहभस्मादिकांशी खललेला व पुन्हा वालुकायंत्रात पक्व केलेला पारा.

**सुसंयत**-वि., सुष्ठु लौल्यादिदोषरहितः, आयत्तपरिधानादिकः ( ड. सुकं. १.१४-१६ )
लोलुपता इत्यादी दोष रहित व असेल ते वस्त्र वापरणारे. ( परिचारक ).

**सुसंस्थित**-वि., शोभनाकारम् ( शस्त्रम् ) ( ड. सुसू. ८.१४ )
चांगले ठेवलेले. शोभेल असे.

**सुसंहत**-वि., सम्यक्संहननयुक्तम् 'तत्र समसुविभक्तास्थि सुबद्धसन्धि सुनिविष्टमांसशोणितं सुसंहतं शरीरमित्युच्यते ( चवि. ८.११६ )
ज्याची हाडे सारखी सुटसुटीत आहेत, सांधे स्नायूंनी चांगले बद्ध आहेत आणि मांस व रक्तही व्यवस्थित (जेथल्या तेथे व्यवस्थित) आहे असे शरीर.

**सुसमाहित**-वि., सावधानः, अवहितचित्तः ( सुचि. ३.२६ )
सावधान, कार्यैकचित्त; कार्यात लक्ष असलेला.

**सुसाध्य**-वि., सुखसाध्यः ( अहसू. १.२९ )
सुखाने साध्य. सहज साध्य होणारा.

**सुसार**-पु., वनस्पति० खदिरभेदः रक्तखदिरः (रा. ८.३६; पृ १२ ) द्र० 'खदिर'
खैराचा प्रकार. लाल खैर. पहा 'खदिर'.

**सुसिद्धक**-पु., निर्यास० सर्जकः (रा. ९.२०५; पृ. १९४)
एक डिंक, राळ.

**सुसेना**-स्त्री., ग्रहमातृ० ( असंउ. ४ )
बालग्रह, ग्रहमाता.

**सुस्रवा**-स्त्री., वनस्पति० सल्लकी (ध. ३.१३५;पृ. १२२)
सालई.

**सुस्वर**-पु., भैषज्य० शङ्खः ( ध. ३.१७९; पृ. १३० )
शंख.

**सुहृत्परिषद्**-स्त्री., परिषद्० त्रिविधपरिषदां मध्ये एका, सा च मित्रभावनया संमिलिता वैद्यानां सभा ( चवि. ८.२० )
तीन प्रकारच्या परिषदांपैकी एक. मित्रभावनेने एकत्र भरवलेली वैद्यांची सभा.

**सूकर**-पु., वनस्पति० कन्दभेदः वाराहीकन्दः ( र. १९.८९ )
एक कंद. डुक्करकंद.
पशु० तन्मांसगुणाः--उष्णम्, स्निग्धम्, गुरु, बृंहणं, वृष्यं, बल्यं, रुच्यं, स्वेदघ्नमामघ्नं, वातघ्नं, श्रमघ्नं च; ग्रामसूकरजमांसगुणाः--गुरुतरं मेदोबलवीर्यनिद्रास्थूलत्वदार्ढ्यकृत् (ध. ६.३९५; पृ.२९६) तद्वसा महायोन्याख्यव्यापदि पूरणार्थं, वातासृग्दरे पानार्थं चोपयुज्यते। तद्वसा मज्जा च निरुद्धमण्याख्ये गुह्यरोगे परिषेकार्थमुपयुज्येते (असंउ.३९)
रानडुक्कर. मांसाचे गुण-- उष्ण, स्निग्ध, जड, पौष्टिक, शुक्र, बलकर, व रुचिकर, आम, घाम, थकवा व वातनाशक. गावातील डुकराच्या मांसाचे गुण-- अधिक जड, मेद, झोप, स्थूलत्व, बल, वीर्य दृढत्व करणारे. वसा-- महायोनि नावाच्या विकारात बोळा ठेवण्यास, वातज रक्तप्रदरात पिण्याकरिता योजतात. निरुध्दमणी या रोगात वसा व मज्जा शिंपडण्याकरिता योजतात.

**( सूकरी )**-स्त्री., वनस्पति० कन्दभेदः, वाराहीकन्दः ( रा. ७.१३४; असंशा. १२.९; पृ. १५२ )
डुक्करकंद.

**-कन्द**-पु., वनस्पति० कन्दभेदः वाराहीकन्दः ( रा. ७.१३५; पृ. १५२ )
डुक्करकंद.

**-पादिका**-स्त्री., वनस्पति० दधिपुष्पी ( ध. १.१५३; पृ. ३६ )
खाजकुहिली.

**-बालक**-पु., धान्य० शालिः (ध. ६.७१; पृ. २१९)
एक साळ, भात.

**सूकरेष्ट**-पु., वनस्पति० गुडकन्दः ( रापरि. ८.६३., पृ. ३६२ )
लहान नागरमोथा.

**सूक्त**–न., आसुत० तद्गुणाः–मधुरं, तिक्तमम्लमुष्णं, तीक्ष्णं, लघु, कटु, रक्तपित्तकरं, पाचनं, भेदनं, मूत्रलं, हृद्यं, रोचनं, कफपित्तघ्नं पाण्डुकृमिशिरोरोग-नासिकादुर्गन्धनाशनम्

( ध. ६.२४६; पृ. २५; अहृसू. ५.७६ )

शिरका. आंबवणी. गुण– मधुर, कडु, आंबट, उष्ण, तीक्ष्ण, हलके, तिखट, रक्तपित्तकर, पाचक, मल-भेदक, मूत्रल, हृदयाला हितकर, रुचि वाढवणारे, कफपित्तनाशक; पांडु, कृमि, शिरोरोग व नाकातून येणारा दुर्गंधनाशक.

**सूक्ष्म**–पु., गुण० सौक्ष्म्ययुक्तः गुणविशेषः, स्थूल-विपरीतो गुणः, सूक्ष्मस्रोतोगामी गुणः(चसू. १.५९) स्रोतोनुसरणशीलः आग्नेयद्रव्यस्य गुणेष्वेकः (सुसू. ४१.३. (३); सूक्ष्ममार्गानुप्रवेशी (ड. सुक. २.१९–२० ) अवगाहकः (सुसू. ४६.५२१ ) विवरणे शक्तिः ( हे अहृसू. १.१८ )

सूक्ष्म. एक गुण. स्थूल गुणाच्या विपरीत गुण. सूक्ष्म स्रोतसांमध्ये जाण्याचा गुण. सूक्ष्म मार्गात प्रवेश करणारा, विषयात खोल शिरणारा. मोकळे करणे. आग्नेयद्रव्याचा एक गुण.

**( सूक्ष्मा )**–स्त्री., वनस्पति० करुणी

( रापरि. १०.२७; पृ. ३७० )

ग्रीष्म ऋतूत सुंदर तांबडी फुले येणारी वनस्पती.

**आकाशमांसी** ( रा. १२.९५ पृ. १०५ )

जटामांसीचा एक प्रकार.

**–घण्टिका**–स्त्री., वनस्पति० शणपुष्पीभेदः द्र० ' शणपुष्पी ' ( रा. ४.३०० ; पृ. ४८ )

रानताग.

**–तण्डुल**–पु., वनस्पति० खस्तिलः खसखसः,

( रा. ४.१९०; पृ. २३२ )

खसखस.

**–तुण्ड**–पु., आग्नेयकीट० अयं शूकतुण्डविषः

( सुक. ३.५ असंउ. ४३ )

एक किडा, आग्नेय.

**–दन्ता**–वि., सूक्ष्मा दन्ता यस्याः सा ( मुचुण्डी ) संदंशयन्त्रवाच्या ( अहृसू. २५.९ )

सूक्ष्म दाते असलेले यंत्र, मुचुंडी, संदंश यंत्र

**–दर्शन**–न., सूक्ष्मनिरीक्षणम् ( असंसू. ३.२५ )

सूक्ष्म निरीक्षण. बारकाईने पाहाणे.

**–दल**–पु., वनस्पति० देवसर्षपकः

( रापरि. ९.४२; पृ. ३६७ )

देवमोहरी.

**–दला**–स्त्री., वनस्पति० धन्वयासः

( रा. ३.२०; पृ. १० )

धमासा.

**–निरीक्षण**–न., अतितनुविषयस्य प्रेक्षणम् नेत्ररोग-हेत्वन्यतममिदम् ( सुउ. १.२७ )

अति सूक्ष्म वस्तूचे निरीक्षण. हे दृष्टीच्या रोगाच्या कारणांपैकी एक.

**–पत्र**–पु., वनस्पति० धन्वयासः

( रा. ३.२६; पृ. ११ )

धमासा.

**रक्तेक्षुः** ( रा. १४.१८९; पृ. १५९ )

तांबडा ऊस.

**सुरपर्णः** ( रा परि. १०.५०; पृ. ३७२ )

सुगंधी व सूक्ष्मपानांची एक वनस्पती.

**धान्यकम्** ( रा. ६.९८; पृ. ८२ ) धने.

**(–पत्रा )**–स्त्री., वनस्पति० क्षुद्रोपोदकी

( रा परि. ७.७६; पृ. ३७३ )

लहान मयाळ.

**अन्यादोडी** ( रा परि. ४.४१; पृ. ३३८ )

हरिणदोडी.

**वृद्धदारुः** ( रा. ३.१५७; पृ. ११५ ) वरधारा.

**शतावरी** ( रा. ४.४३८; पृ. ६७ ) शतावरी.

**वन्यजीरः** ( ध. २.७२; पृ. ८३ ) रानजिरे.

**(–पत्री )**–स्त्री., वनस्पति० आकाशमांसी

( रा. १२.९५;पृ. १०५ )

जटामांसी.

**–पत्रक**–पु., वनस्पति० बदरम्

( रा. ११.१६४; पृ. १८९ )

बोर.

**वनबर्बरिका** ( रा. १०.८८; पृ. १४६ ) रानतुळस.

**–पत्रान्तरा**–स्त्री., वनस्पति० विष्णुक्रान्ता

( ध. ४.११५; पृ. १५७ )

विष्णुकांता.

**–पत्रिका**–स्त्री., वनस्पति० शतपुष्पा

( रा. ४.३; पृ. ६९ )

बडिशेप.

**–पर्णी**–स्त्री., वनस्पति० **सूक्ष्मपुष्पा, शणपुष्पीभेदः, द्र० 'शणपुष्पी'** ( रा. ४.३००; पृ. ४८ ) रानताग.

**–पिप्पली**–स्त्री., वनस्पति० **वनपिप्पली** ( रा. ६.१२२; पृ. ८६ )
रानपिंपळी.

**–पुष्पा**–स्त्री., वनस्पति० **शणपुष्पीभेदः द्र० 'शणपुष्पी'** ( रा. ४३००; पृ.४८ ) रानताग प्रकार.

**–पुष्पी**–स्त्री., वनस्पति० **शङ्खिनी** ( रा. ३.३८१; पृ. ५९ ) सांखवेल.

**–फल**–पु., वनस्पति० **बदरम्** ( रा. ११.१४६; पृ. १८९ ) बोर.
**भूकर्बुदारः** ( रा. ११.१५०; पृ. १८८)
भोकराचा एक प्रकार.

**–बदरी**–स्त्री., वनस्पति० **भूबदरीभेदः द्र० 'बदर'** ( रा. ११.१६२; पृ. १८९ ) बोराचा एक प्रकार.

**–बीज**–पु., वनस्पति० **खस्तिलः खसखसः** ( रा. ४.१९० पृ. २३२ )
खसखस.

**–मूला**–स्त्री., वनस्पति० **बलामोटा** ( धपरि. ४.१; पृ. १६८ )
बारीक मुळांची हिरवीगार वनस्पती, शेवरी.

**–लोचना**–वि., **अल्पद्वारजालका (कुटी)** ( चवि. १.१९ )
लहान छिद्रयुक्त व बारीक जाळी असलेली कुटी.

**–वल्ली**–स्त्री., वनस्पति० **ताली** ( रापरि. ३.३७; पृ. ३३२ )
लव असलेली तांबडी बारीक वेल.
**जन्तुका** ( रा. ३.१२८; पृ. १५१ )
पुष्कळ गाठाळ पानाची खाजकुहिली सारखी पण वाकड्या फळांची वनस्पती.
**कारवल्ली** (रा. ७.२७८; पृ. ४५) कारले.

**–शाख**–पु., वनस्पति० **जालबर्बुरः** ( रापरि. ८.१४; पृ. ३५७ )
बाभूळ एक प्रकार.

**–शालि**–स्त्री., धान्य० **व्रीहिभेदः द्र० 'व्रीहि'** ( रा. १६.९२; पृ. २२१ )
तांदुळाचा एक प्रकार.

**–सागरगामिनी**–स्त्री., वनस्पति० **सूक्ष्मैला द्र० 'एला'** ( रा. ६.६९; पृ. ७८ ) लहान वेलदोडा.

**–स्रोतस्**–न., शारीर० **अणुस्रोतः, नाभिश्च रोमकूपाश्च सूक्ष्मस्रोतांसि** ( काशाशरीरविचय )
सूक्ष्म स्रोतस. बेंबी, रोम कूप ही सूक्ष्मस्रोतसे.

**सूक्ष्मैला**–स्त्री., वनस्पति० **एलाभेदः, द्र० 'एला'** ( ध. २.४४; पृ. ७८ )
लहान वेलदोडा.

**सूचक**–वि., **परानिष्टजनकाभिधायकः, कर्णेजपः, पिशुनः** ( चसू. ७.५६ )
निंदक, चहाडखोर, हेर, कानाशी लागणारा. दुसऱ्याचे वाईट होईल असे बोलणारा.
पु., धान्य० **व्रीहिभेदः द्र० 'व्रीहि'** ( रा. १६.९२; पृ. २२१ )
तांदळाचा प्रकार.

**सूचन**–न., **अंशतो लेशतोऽर्थप्रकाशनम्** ( सुसू. ३.१२ )
थोडा अर्थ व्यक्त करणे.

**सूचि**–स्त्री., सीवनशस्त्र० **तीक्ष्णकण्टकाकारो लौहादिमयः** ( चनि. ३.७ ) **तीक्ष्णाग्रा सरला, वक्रा, धनुराकारा इति त्रिप्रकाराः, तदिदं सीवनव्यधनविस्रावणोपयोगि शस्त्रम्** ( सुसू. ८.४ )
शिवण्याचे शस्त्र. सुई. तीक्ष्ण काट्यासारखी लोखंड इत्यादींची केलेली. प्रकार ३ (१) तीन कोण असलेली, तीन अंगुळे लांब ही मांसल प्रदेश शिवण्यासाठी. (२) दोन अंगळे लांब असलेली अल्प मांस व अस्थिसंधीत असलेले व्रण शिवण्यासाठी. (३) अडीच अंगुळे लांब पण धनुष्यासारखी बाकदार व तांदळाच्या टोकासारखे वाकडे टोक असलेली पक्वाशय, आमाशय व मर्म शिवण्यासाठी. ह्या शिवणे, भोक पाडणे व स्राव करणे या कामास उपयुक्त.

**–दल**–पु., वनस्पति० **शितिवारः** ( रा. ४.२०७; पृ. ३६ )
कुरडू.

**–पत्र**–पु., वनस्पति० **शितिवारः** ( ध. १.१५५; पृ. ३६ )
कुरडू.

**–पत्रक**–पु., वनस्पति० **शितिवारः** ( रा. ४.२०६; पृ. ३६ )
कुरडू.

**–मल्लिका**–स्त्री., वनस्पति० **वनमल्लिका** ((रा. १०.२३६; पृ. १९९ )
रानमोगरी.

**–वक्त्र**–न., रत्न० **हीरकम्** ( ध. ६.५५; पृ. २१६ )
हिरा.

**–शालि**–स्त्री., धान्य० व्रीहिभेदः, सूक्ष्मशालि द्र० 'व्रीहि' ( रा. १६.९२; पृ. २२१ )
तांदळाचा एक वर्ग. सूक्ष्म साळ.

**सुचिकापुष्प**–पु., वनस्पति० केतकी ( ध परि. ५.१; पृ. २०४ )
केवडी, केवडा.

**सुचिकाभरण**–पु., सिद्धयोग० हीरकवैक्रान्तशृङ्गीविषनवसागराम्बिजारशार्ङ्गेष्ट्यादियुक्तो योगविशेषः ( र. १२.७६-८१ )
एक सिध्द योग. हिरा, वैक्रांत, शृंगी, विष, नवसागर, अंबर, कावळी इत्यादी द्रव्ये असलेला.

**सुची**–स्त्री., शस्त्र० असौ सीवनोपयोगिनी ( चचि. २९.३६, सुचि. २९.१० ) द्र० 'सुचि'
सुई; एक शस्त्र. शिवण्यास उपयुक्त.
**वनस्पति० दर्भ** ( र. १८.४७-५२ ) दर्भ.
**कुशः** ( र. १८.४७-५२ ) कुश, दर्भप्रकार.

**–कूर्च**–पु., न., शस्त्र० द्र० 'कूर्च' ( अहृसू. २६.२२; असंसू. ३४.३१ )
एक शस्त्र. गोल बैठकीवर सात आठ सुया एकत्र असलेले शस्त्र.

**–कूर्चक**–न., शस्त्र० द्र० 'कूर्च' ( असंउ. २८ )
एक शस्त्र.

**–पत्र**–पु., वनस्पति० इक्षुभेदः द्र० 'इक्षु' ( सुसू. ४५.१५४ )
उसाचा प्रकार.

(**– पत्रा** )–स्त्री., वनस्पति० गण्डदूर्वा द्र० 'दूर्वा' ( रा. ८.२३४ पृ. १६४. )
गाठी दूर्वा.

**–पाश**–पु., सूचिनेत्रम्, सूचिच्छिद्रम् (सुउ. ७.१०)
सुईचें च्छिद्र–भोक.

**–पिप्पलक**–पु. न., शस्त्र० सूच्याकारः शस्त्रविशेषः (चशा. ८.३४ )
सुईच्या आकाराचे एक शस्त्र.
**सूचिः सीवनार्थं सूत्रं च** ( चशा ५.१२ )
सुई व शिवण्याचा दोरा.
**सूचिस्थापनपात्रम्** ( चशा. ५.१२ )
दोऱ्यासह सुई ठेवण्याचा करंडा, पात्र.

**–मुख**–वि., मूले स्थूलो मुखे अणुः ( भगन्दरव्रणः ) ( सुचि. ८.२७ )
तोंडाला सूक्ष्म व मूळात मोठा असा भगंदराचा व्रण.
पु., कीट० सविषोऽयं, सौम्यः श्लेष्मप्रकोपणः, कफविकारान् करोति ( सुक. ८.१२-१५; असं. उ. ४३ )
एक किडा. विषारी, सौम्य, कफप्रकोपक; कफविकार करतो.
**वनस्पति० कुशः** ( रा. ८.२०८ पृ. १६१ )
कुश, दर्भ.
**पारदादियोग० पारदगन्धकहरितालमनःशिलामाक्षिकतुत्थजयपालवत्सनाभादियुक्तः, धनुर्वातकासश्वासप्रलापहिक्कामूकत्वबधिरत्वोन्मादापस्माराdिनाशकः** ( र. १२.९९ )
पारा इत्यादींचा योग. पारा, गंधक, हरताळ, मनशीळ, सुवर्णमाक्षिक, मोरचूद, जयपाळ, बचनाग इत्यादीयुक्त. धनुर्वात, खोकला, श्वास, बडबड, उचकी, मुकेपणा, बहिरेपणा, उन्माद अपस्मार नाशक.

**–मुखाकृति**–वि., सूचीमुखवत्–अग्रवत्–( अर्शः ) सूक्ष्माकृति ( सु नि. २. १० )
सुईच्या टोकासारखी सूक्ष्म. ( मूळव्याध ).

**–मुखी**–स्त्री., योनिरोग० वातलाहारसेविन्यां जनन्यां कुपितो वायुः स्त्रियाः–गर्भस्थयोषायाः योनिमणुद्वारां कुर्यात् (च सू. १९.४(९)) (चचि. ३०३१–३२) त्रिदोषजो रोगः, अतिसङ्कुचितमुखी योनिः ( सुउ. ३८.१९ )
एक योनिरोग. वातूळ आहार सेवन करणाऱ्या आईचा प्रकुपित वायु गर्भातील मुलीची योनि बारीक भोक ( तोंड ) असलेली करतो. अतिआकुंचित – बारीक भोकाची योनि. हा त्रिदोषज रोग.

**सूचिवक्त्रा**–स्त्री., योनिरोग० सूचीमुखी ( सुउ. ३८.१९ )
सुईसारख्या सूक्ष्म तोंडाची योनि.

**सूच्याह्व**–पु., वनस्पति० शितिवारः ( ध. १.११५; पृ. ३६ ) कुरडू.

**सुत**–पु., खनिज० पारदः ( रा. १३.४३; र. १.२७ पृ. २१४ )
पारा.

( **सुता** )–वि., प्रसूता ( अहृसू. ७.७० )
बाळंत झालेली, बाळंतीण.

**–राज्**–पु., खनिज० पारदः ( रा. १३.४१; पृ. २१४)
पारा.

**सूतक**–पु., खनिज० पारदः ( र. १.२३ )
पारा.

**सुताञ्जन**–न., अञ्जन० अञ्जनमिदं पारदटङ्कणजम्बीरयुक्तं नेत्रपटलरोगनाशकम् ( र. २३.५२ )
एक अंजन. पारा, टाकणखार, निंबुयुक्त. डोळयाच्या पडद्यांचा रोगनाशक.

**सूति**–स्त्री., प्रसूतिः ( र. २.१४४.१४५ )
प्रसूति. बाळंत होणे.

**सूतिका**–स्त्री., प्रसूता स्त्री ( चशा. ८.४७; सुशा. १०.१६ ) **सूतिका चिकित्सा–सूतिकाया यत्कर्तव्यम्–वातहरैः सिद्धं पयः पानार्थम्, अनन्तरं दशाहं भोजने हितम्। दशाहादनन्तरं द्वितीयं च दशाहं रसो भोजने हितः, दिनविंशतेरनन्तरं सा स्त्री लघुपथ्याल्पभोजना सती तथा स्वेदाभ्यङ्गपरा स्नेहान्बलादिकान्भजेत्** ( अरु. सुचि. १५.२६-२७ )
बाळंतीण. उपचार— वातहर द्रव्यांनी सिद्ध दूध पिण्याकरिता व दहा दिवस जेवणाकरिता हिताचे; नंतर दहा दिवस मांसरस भोजनात उपयुक्त. नंतर हलके पथ्याचे थोडे जेवण. बलादि तेलाने अभ्यंग करून शेक करावा.

**–ज्वर**–पु., रोग० **प्रसूतानां नारीणां ज्वरः, वेगसन्धारणव्यायामादिहेतुभिः सञ्जातो ज्वरः स षड्विधः–दोषभेदेन चतुर्विधः, स्तन्यागमोत्थो ग्रहोत्थश्च; तल्लक्षणानि–वातजज्वरलक्षणानि–विषमोष्माङ्गमर्दौ जृम्भा, रोमहर्षणं, कषायविरसास्यता, शीतद्वेषोष्णकामिता, दन्तहर्षः, प्रलापः, प्रजागराध्मानाङ्गसङ्कोचः शुष्कोद्गारश्च; पित्तजज्वरलक्षणानि–तृष्णादाहप्रलापवमथुपीतास्यनखदन्ताक्षिविण्मूत्रताकण्ठशोषकटुकास्यताभ्रमशीताभिलाषाः; कफजज्वरलक्षणानि–प्रतिश्यायकासष्ठीवनशिरोरुग्गात्रगौरवोष्णाभिकामितामन्दोष्मतानिद्रातन्द्राहिमद्वेषमधुरास्यतागात्रसादान्नविद्वेषशुक्लमूत्रपुरीषताः; सन्निपातज्वरलक्षणानि–मुहुर्दाहः, कृच्छ्रविण्मूत्रवातत्वं वातेनाङ्गात्राभिसञ्जनं नामघर्षणं दाहस्तृष्णाप्रलापः, पित्ताद्विक्षिप्तचित्तता, कफाद्गुरुत्वं कण्ठसंरोधः; स्तन्यजज्वरलक्षणानि–तृतीयेह्नि चतुर्थे वा नार्याः स्तन्यं प्रवर्तते, संवृतानि पयोवहानि स्रोतांसि स्तन्यमभिघट्टयेत्। तेन स्तनयोः स्तम्भः; हृदयद्रवः, पिपासा, कुक्षिपार्श्वकटीशूलाङ्गमर्दशिरोरुजश्च भवन्ति। ग्रहजज्वरलक्षणानि–आक्षेपचक्षुर्विभ्रमश्रमहस्तनेत्रकम्पनहारिद्रमुखनेत्रतानिद्रानाशकेशलुञ्चनाक्रोशवातजज्वरलक्षणानि, क्षणेन श्यावता क्षणमात्रं सवर्णता च** ( काखिल. ११.३९.६९ ) **तच्चिकित्सासूत्रम्–स्वेदोऽपतर्पणं युक्त्या पाचनौषधसेवनं कषायोऽभ्यञ्जनं सर्पिर्ज्वरघ्नः परमो विधिः** ( काखिल. ११.७५ )
बाळंतरोग, बाळंतिणीचा ज्वर. मळमूत्रांचे विसर्जन रोकले, व्यायाम व इतरही कारणांनी होतो. प्रकार सहा. दोषांचे चार, दुधाचा एक व ग्रह बाधेचा एक. त्या त्या दोषज्वराची चिन्हे. संनिपात ज्वराची चिन्हे. ( पहा 'ज्वर'. ) दुधाचा-ताप–दुधाची स्रोतसे जेव्हां दोषांनी अडवली जातात तेव्हा दूध साचते, घट्ट होते म्हणून स्तन मोठा कठीण ताठर होतो, छातीत धड धड, तहान; कूस, फासळ्या कंबर यात शूळ, अंग ठणकणे, डोकेदुखी ही लक्षणे होतात. भूतबाधेने येणारा ज्वर– आचके, थकवा, हात डोळे यांचा कंप, तोंड–डोळे पिवळे, झोप नसणे, चमत्कारिक दृष्टि, केस उपटणे, ओरडणे, क्षणात काळसरपणा येतो व जातो. इतर वातज ज्वर लक्षणे होतात. उपचारांचे सूत्र– अवस्थाना अनुसरून लंघन, घाम काढणे, अभ्यंग, पाचन औषधे व ज्वरनाशक तूप देणे.

**–रोग**–पु., **सूतिकाविकारः, काश्यपसंहितायां चतुःषष्टिर्विकारा उक्ताः** ( का. खिल. १०.१४ )
बाळंत रोग. हे ६४ आहेत.

**–षष्ठी**–स्त्री., **प्रसूतायाः षष्ठं दिनम्, तदा षण्मुखीं षष्ठीं पूजयेत्** ( का. बालग्रहचि. )
बाळंत झाल्यावर सहावा दिवस. तेव्हा सहा तोंडाच्या षष्ठीची पूजा करावी.

**सूतिकामृत**–न., भैषज्य० **सौभाग्यशुण्ठिः** ( र. २२.११७-२२ )
एक योग, सौभाग्य सुंठी.

**सूतिकागार**–न., **सूतिकागृहम्, प्राक् चैवास्या नवमान्मासात् सूतिकागारं कारयेदपहृतास्थिशर्कराकपाले देशे प्रशस्तरूपरसगन्धायां भूमौ प्राग्द्वारमुदग्द्वारं वा बैल्वानां काष्ठानां तैन्दुकैङ्गुदकानां भल्लातकानां वारणानां खादिराणां वा, यानि चान्यान्यपि ब्राह्मणाः शंसेयुरथर्ववेदविदस्तेषां; वसनालेपनाच्छादनापिधानसंपदुपेतं वास्तुविद्याहृदययोगाग्निसलिलोदूखलवर्चःस्थानस्नान-भूमिमहानसमृतुसुखं च। तत्र सर्पिस्तैलमधुसैन्धवसौवर्चलकालविड्लवणविडङ्गकुष्ठकिलिमनागरपिप्पली-पिप्पलीमूलहस्तिपिप्पलीमण्डूकपर्ण्येलालाङ्गलीवचा-**

चव्यचित्रकचिरबिल्वहिङ्गुसर्षपलशुनकतककणकणिकानीपातसीबल्वजभूर्जकुलत्थमैरेयसुरासवाः सन्निहिताः स्युः, तथाऽश्मानौ द्वौ, द्वे कुण्डमुसले, द्वे उलूखले, खरवृषभश्च, द्वौ च तीक्ष्णौ सूचिपिप्पलकौ सौवर्णराजतौ, शस्त्राणि च तीक्ष्णायसानि, द्वौ च बिल्वमयौ पर्यङ्कौ, तैन्दुकैङ्गुदानि च काष्ठान्यग्निसन्धुक्षणानि ( चशा. ८.३३-३४ ) नवमे मासि सूतिकागारमेनां प्रवेशयेत् प्रशस्ततिथ्यादौ, तत्रारिष्टं ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्राणां श्वेतरक्तपीतकृष्णेषु भूमिप्रदेशेषु बिल्वन्यग्रोधतिन्दुकभल्लातकनिर्मितं सर्वागारं यथासंख्यं तन्मयपर्यङ्कमुपलिप्तभित्तिसुविभक्तपरिच्छदं प्राग्द्वारं दक्षिणद्वारं वाऽष्टहस्तायतं चतुर्हस्तविस्तृतं रक्षामङ्गलसंपन्नं विधेयम् ( सुशा. १०.५ )

प्रसूतीगृह– बाळंतिणीची खोली. नवव्या महिन्यापूर्वीच बाळंतिणीची खोली बांधली पाहिजे. ज्या जागेतले दगड, वाळू, खापऱ्या काढून घेतल्या आहेत; घाण वास नाही; रूप, रस, गंध यानी प्रशस्त अशा जागेवर पूर्वेकडे किंवा उत्तरेकडे दार असलेले; बेल बिब्बा, टेंभुरणी, हिंगणबेट, वायवरणा, खैर इत्यादी लाकडांचे किंवा अथर्ववेद जाणणारे ब्राह्मण सांगतील त्यांचे घर करावे. त्यात कपडे, आंथरूण, पांघरूण, कपाट लेपादि द्रव्ये इत्यादी युक्त गृहनिर्माणशास्त्राप्रमाणे अग्नि, पाणी, उखळ यांची स्थाने, शौचकूप, न्हाणीघर, स्वयंपाकघर योग्य ठिकाणी असलेले त्या त्या ऋतूमध्ये सुखावह वातावरण राहील अशी व्यवस्था केलेले घर करावे. सामुग्री– तूप, तेल, मध, सैंधव, पादेलोण, काललवण, बिडलवण, वावडिंग, कोष्ठ, तेल्यादेवदार, सुंठ, पिंपळी, पिंपळमूळ, गजपिंपळी, ब्राह्मी, वेलदोडे, कळलावी, वेखंड, चवक, चित्रक, करंज, हिंग, मोहरी, लसूण, निवळी, बारीक जाड अशा तांदळाच्या कण्या, मुसळ कळंब, आळशी, मोळ, भूर्जपत्र, कुळीथ, दारू, आसव, उसाची दारू ही द्रव्ये तेथे असावीत. तसेच दोन दगड, दोन छोटी मुसळे, दोन उखळे, गाढव, बैल, सोने व चांदीच्या तीक्ष्ण दोन सुया व योग्य अशा दोऱ्यासह त्या ठेवण्याचा करंडा पोलादाची तीक्ष्ण उपयुक्त शस्त्रे, टेंभुरणीची हिंगणबेटाची लाकडे ( पेटवण्याकरिता ) सूतिकागृह ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्राकरिता क्रमाने पांढरी, तांबडी, पिवळी, काळी, जमीन पाहून तीवर क्रमाने बेल, वड, टेंभुरणी, बिब्बा यांच्या लाकडाचे घर व पलंग करावेत. भिंती चांगल्या लिंपलेल्या असाव्या. ती खोली आठ हात लांब, चार हात रुंद, भूतबाधा नाहीशी करता येईल अशा सामुग्रीने युक्त मंगल असावी.



**सूतिकासन**–न., सूतिकाया आसनम् ( काशा. ५ )
बाळंतिणीचे आसन.
**सूतिकागारम्** ( काशा. ५ ) बाळंतिणीचे घर.

**सूती**–स्त्री., प्रसूतिः ( असंशा. ४.३३ ) बाळंतपण.
**–रोग**–पु., सूतिकारोगः ( र. २२.४१ ) बाळंतरोग.

**सूतेन्द्र**–पु., पारदयोग० मुक्ताप्रवालसुवर्णरौप्यगन्धकवैकान्तादियुक्तः, मात्रा–पञ्च गुञ्जाः, असौ शुक्रवर्धकः, ध्वजभङ्गनाशकश्च ( र. २७.४३-५१ )
पाऱ्याचा योग. मोती, प्रवाळ, सोने, रुपे, गंधक, तोरमल्ली इत्यादी युक्त. मात्रा ५ गुंजा. हा शुक्रवर्धक, लिंगाचे उत्थापन करणारा.
**खनिज० पारदः** ( र. १.३२ ) पारा.

**सूतेन्द्रबन्धिन्**–पु., पारदस्य चाञ्चल्यनाशनेन बन्धकः ( अभ्रकगुणः ) ( र. २.३ )
पाऱ्याची चंचलता नाहीशी करून त्याला बांधणारा (अभ्रक).

**सूत्र**–न., सूचनात् सूत्रणाच्च अर्थसंततेः सूत्रम् ( चसू. १.२४ ) स्वल्पाक्षरमसन्दिग्धं सारवद्विश्वतोमुखम् ( चसू. ३०.३१ )
थोड्या अक्षरात पुष्कळ अर्थ व्यक्त करता येईल अशा सूचक शब्दांची रचना म्हणजे सारयुक्त सूत्र होय. सारयुक्त निश्चित अर्थाचे थोडे शब्द व व्यापक अर्थ असलेले वाक्य- वचन.
**तन्तुः** ( सुसू. ५.६ ) व्रणसीवनार्थमुपयुज्यते ( अहसू. २९.५३ )
धागा, दोरा. शिवण्याकरिता उपयुक्त.
**–विद्**–वि., शास्त्रवित् ( सुचि. २.४६ )
शास्त्र जाणणारा.
**–स्थान**–न., चरकसंहितायाः, सुश्रुतसंहितायाः, अष्टाङ्गहृदयसंहितायाः च प्रथमस्थानम्
चरक, सुश्रुत, अष्टांगहृदय या ग्रंथांचे पहिले स्थान.

**सूत्रण**–न., सूत्ररूपेण शास्त्ररचना ( चसू. १.३४ )
सूत्र रूपाने शास्त्राची रचना.
**अर्थानां यथास्थानं निवेशनम्** ( सुसू. ३.१२ )
अर्थांची योग्य ठिकाणी जुळणी. विषयाची योग्य क्रमाने–योग्य संदर्भाने मांडणी.

**सूद**–पु., सूपकारः, अन्नसंस्कारकः ( सुसू. ४६. ४५४ )
स्वयंपाकी.

**सूना**–स्त्री., वधस्थानम् ( असंसू. ३.४६ )
वध करण्याचे स्थान. फाशीची जागा.

**सूप**–पु., आहारद्रव्य० यूषः, मुद्गादिनिर्मितं क्वाथ इवान्नं, येन मिश्रितमोदनादि भुज्यते। दालिव्यञ्जनम् ( च. सू. २७.२६२ )
कढण. मूग इत्यादींचे काढ्या सारखे उकळलेले द्रव अन्न. कट. ज्याच्या बरोबर कालवून भात भाकरी खातात, डाळीचे पातळ कालवण.

**–धूपन**–न., वनस्पति० निर्यास० हिङ्गुः ( ध. २.३६; पृ. ७७ )
हिंग.

**–श्रेष्ठा**–स्त्री., धान्य० मुद्गः ( ध. ६.८०; पृ. २२३ )
मूग.

**सूपविष्ट**–वि., सम्यगुपविष्टः ( चसू. ५.४८ )
चांगला व्यवस्थित बसलेला.

**सूपौदन**–न., सूपसहितमोदनं भक्तम् ( ड. सुसू. ४६.४५४ )
कढणासह भात. आमटी भात, वरण भात.

**सूप्य**–वि., सूपयोग्यं धान्यम् ( चसू. २७.२३ ) सूपे साधु ( असंसू. ७.२६ ) सूपे हितम्, शिम्बीधान्यम् ( हे. अहसू. ६.२६ ) मुद्गराजमाषादिपत्राणि ( अरु. अहसू. ६.९४ )
कढणाचे धान्य. कट करण्याचे धान्य. शेंगा धान्य. तूर, मूग, चवळी व त्यांची पाने.

**( सूप्या )**–स्त्री., धान्य० मसूरिका ( ध. ६.९५; पृ. २२६ )
मसूर.

**–धान्य**–न., यूषोपयोगि मुद्गकुलत्थादिधान्यम् ( चचि. ८.१२८ )
कढणाकरिता–आमटी–करता मूग कुळीथ इत्यादी धान्य.

**–पर्णी**–स्त्री., वनस्पति० विशेषः ( असंउ. २ )
एक वनस्पती.

**–शाक**–न., माषपर्ण्यादिशाकविशेषः (चसू. २७.९८)
रान उडीद इत्यादी भाज्यांचा वर्ग.

**सूप्यान्नविकृत**–वि., मुद्गमाषविकारो विकृतिर्वा सूप्यान्नस्य विकारा भक्ष्याः नाम सूप्यान्नसाधिता भक्ष्याः ( चसू. २७.२७४ )
मूग, उडीद इत्यादींचे पदार्थ.

**सूरकन्द**–पु., वनस्पति० सूरणः (रापरि. ६.७; पृ.१६९)
सूरण.

**सूरण**–पु., वनस्पति० तद्गुणाः–कटुः, ईषत्कषायो रूक्षो गुरुर्विष्टम्भी ( सुसू. ४६.३०६-३०७ ) लघुः ( र. २०.२१९ ) रुच्यो दीपनः पाचनो कफवातलः पित्तहरश्च, (सु) कृमिशूलगुल्मश्वासकासच्छर्द्यर्शोघ्नः ( धपरि. ४.६; पृ. १६८ ) गुदकीलहरः (सु) प्लीहनाशनः ( र. २०.२१९-२१ )
हिं.—जङ्गली सुरण.
**म.—सूरण.**
बं.—ओल.
सूरण–तिखट, थोडा तुरट, रूक्ष, जड, अवष्टंभक, पचनास हलका, रुचकर, दीपक, पाचक, वातकफकर, पित्तकर; कृमि, शूल, गुल्म, श्वास, खोकला, ओकारी, मूळव्याधनाशक प्लीहानाशक.

**सूरिका**–स्त्री., वनस्पति० सर्षपः ( र. १८.४७-५२ )
मोहरी.

**सूरिसत्तम**–पु., पण्डितप्रधानः ( सुसू. ४६.५३२ )
विद्वानात प्रधान, मुख्य पंडित.

**सूर्प**–न., मान० शूर्पम्, द्रोणद्वयम्, अष्टचत्वारिंशदधिकद्विसहस्रतोलकाः ( र. २८.४८-५२ )
प्रमाण, वजन. सूप. दोन हजार अठ्ठेचाळीस तोळे.

**–पर्णी**–स्त्री., वनस्पति० मुद्गपर्णी माषपर्णी वा ( चचि. २८.१५१ )
रानमूग किंवा रानउडीद.
**माषपर्णी** ( चचि. २८.१५१ ) रानउडीद.

**सूर्य**–पु., देवता० भास्करः, चक्षुषोऽधिदैवतम्, आकाशस्थो ग्रहविशेषः ( सुशा. १.७ )
सूर्य. डोळ्याचे अधिदैवत, आकाशील एक ग्रह–सूर्य.

**( सूर्या )**–स्त्री., वनस्पति० इन्द्रवारुणी ( रा. ३.३७१; पृ. ५८ )
कवंडळ, कडुइंद्रावण.

**–कान्त**–पु., मणि० ( चचि. ९.१८ ) श्वेतमणि० सूर्यकिरणसंपर्केऽस्माद्वह्निर्निष्क्रामति ( र. ४.२-३ ) असौ तिलकालकमषकान्दग्धुमुपयुज्यते ( असंउ. ३७ )
एक मणी. सूर्यकिरणात हा धरला असता यातून बाहेर जाणारे किरण कापूस इत्यादी वस्तु जाळतात. हा तीळ, मस जाळण्यास उपयुक्त.

**-पक्व**-वि., **सूर्यातपे पक्वम्** ( सुचि. १.१०८ )
उन्हाने पिकलेले, उन्हाने पक्व केलेले.

**-पादसंताप**-पु., आतपोष्मा ( चचि. ७.१६३ )
सूर्याच्या किरणांची उष्णता.

**-प्रभा**-स्त्री., आतपः ( सुउ. १९.९-१० ) ऊन्ह.
**पारदयोग० भार्ङ्गीहरबीजभल्लातकभङ्गा त्रिकटुत्रिफला गन्धककेशरयुक्तः कल्पोऽयं जठराग्निप्रदीपनः** ( र. १९.३९-४१ )
पाऱ्याचा एक योग. भारंगी, पारा, बिब्बा, भांग, त्रिकटु, त्रिफळा, गंधक, केशरयुक्त. हा जठराग्नि प्रदीप्त करतो.

**-भक्ता**-स्त्री., **वनस्पति० आदित्यभक्ता** ( ध. ४.९८; पृ. १५३ )
एक वनस्पती. सूर्यवेल.

**-मारुतिक**-वि., **सूर्यमारुताभ्यां निवृत्तः रसायनप्रकारः वातातपिकः सुखोपचारा भ्रंशेऽपि देहस्या बाधकः** ( असंउ. ४९ )
ऊन व वारा. हीं न टाळताही जे रसायन सेवन करावयाचे ते. ते सुखाने घेता येते व काही चूक झाली तरी बाधक होत नाही.

**-रस**-पु., **पारदयोग० पारदो गन्धकस्ताम्रमभ्रकं पिप्पली शुण्ठी मरिचं वत्सनाभमित्यादिना साधितः कल्पोऽयं कासादिघ्नः** ( र. १३.६७ )
पाऱ्याचा एक योग. पारा, गंधक, तांबे, अभ्रक, पिंपळी, सुंठ, मिरी, बचनाग, इत्यादींनी केलेला. हा खोकला इत्यादींवर उपयुक्त.

**-लता**-स्त्री., **वनस्पति० आदित्यभक्ता** ( रा. ४.१४४ पृ. १५३ )
सूर्यफूलवल्ली, आदित्या, खोबरदोडी.

**-वर्त**-पु., शिरोरोग० द्र० ' **सूर्यावर्त** (र. २४.३-५४)
डोक्याचा रोग. पहा 'सूर्यावर्त'.

**-वल्ली**-स्त्री., **वनस्पति० पटोलसदृशपत्रा, यस्याः पत्ररसेनाक्तं मांसं स्विन्नमिव भवति, अन्ये ' सूर्यावर्त'माहुः** ( ड. सुक. २.४४-४६. ) **अर्कपुष्पी** ( सुसू. ४५.१२० )
पडवळाच्या पानांसारखी. पानाचा रस मांसाला लावला तर ते शिजल्यासारखे होते. सूर्यावर्त, अर्कपुष्पी.

**सूर्यापवृत्ति**-स्त्री., **सूर्यास्तसमयः** ( ड. सुउ. २५.१२
सूर्यास्त, सूर्यास्ताची वेळ.

**सूर्यातपप्रतापन**-न., **सूर्यातपेन तापनम्, अथवा उष्णीकरणम्** ( सुसू. ४५-१२ )
सूर्याच्या उन्हाने तापविणे.

**सूर्यावर्त**-पु., शिरोरोग० एकादशशिरोव्याधिष्वेकः ( चचि. ९.७९-८१ ) **पित्तानुबन्धो वातः शङ्खाक्षिभ्रूललाटेषु सस्पन्दनां रुजां कुर्यात्। सूर्योदयस्य पश्चाद्रुजा भवति। एषा च रुगामध्याह्नं विवर्धिष्णुः क्रमेण वृद्धिशीला भवति। क्षुद्वतस्तद्विशेषेण भवति। मध्याह्नात्परं कदाचिच्छीतेन कदाचिदुष्णेन वा सा रुक्प्रशाम्यति। एवंरूपो रोगो नाम्ना सूर्यावर्तः; तत्र बृंहणं नस्यं हितम्** ( अहसू. २०.३ ) **तच्चिकित्सा नस्यलेपपरिषेककवलग्रहशिरोबस्त्यादयो विधातव्याः** ( सुउ. २६.३० )
डोक्याचा रोग. ११ शिरोरोगांपैकी. पित्ताच्या सहकाराने वात, शंख, ( कानशीळ ) डोळे, भुवई, कपाळ यात शिरा उडतात व वेदना होतात. वेदना सूर्योदयानंतर सुरू होऊन मध्यान्हापर्यंत वाढत जातात. भुकेलेल्यास अधिक होतात. नंतर केव्हा उष्णतेने केव्हा थंडाव्याने त्या शमतात. **उपचार**-पौष्टिक औषध नाकात घालावे. शिवाय लेप, सिंचन गुळण्या, डोक्याचा बस्ति हे उपचार करावे.
**पारदयोग० गन्धकताम्रेत्यादियुक्तः कल्पः, असौ श्वासनाशनः** ( र. १३.५२-५३ )
गंधक, तांबे इत्यादीयुक्त पाऱ्याचा योग. श्वास नाशक.
**वनस्पति० आदित्यभक्ता** ( र. २०.२१३-१४ )
सूर्यफूलवल्ली, आदिता, खोबरदोडी.

**( सूर्यावर्ता )**-स्त्री., **वनस्पति० आदित्यभक्ता** ( र. ११.५२-५७ )
खोबरदोडी, सूर्यफूल वल्ली, आदित्या.

**सूर्यावर्तादिगण**-पु., **द्रव्यगण० सूर्यावर्तककदलीवन्ध्याकोशातकीसुरदालीशिग्रुवज्रकन्दनीरकणाकाकमाच्यः; इत्ययं सूर्यावर्तादिगणः** ( र. ३.१३२ )
खोबरदोडी इत्यादींचा गण. खोबरदोडी, केळ, वांझकर्टोली, दोडकी, देवडांगरी, शेवगा, वज्रकंद, जलपिंपळी, कावळी.

**सूर्याह्व**-पु., **वनस्पति० अर्कः** ( ध. ४.१३; पृ. १३६ )
रुई.

**सूर्याह्वय**–पु., वनस्पति० **अर्कः** ( ध. ४.१३; पृ. १३६ ) रुई.

**सूर्योदय**–पु., योग० **विषहरः** ( असंउ. ४० ) उपचार. विषहारक.

**सूर्योद्धतप्रमुक्तजल**–न., **सूर्येण पूर्वमुद्धतं पश्चात्प्रमुक्तं जलम्** ( असंसू. ६.४ )
सूर्याच्या उष्णतेने, वाफरूपाने वर आकाशात जाऊन पुन्हा खाली आलेले पाणी.

**सूर्योपराग**–पु., **सूर्यग्रहणम्** ( असंसू. ३२.७ )
सूर्याची लाली, सूर्यग्रहण.

**सूषा**–स्त्री., वनस्पति० **कासमर्दः** ( अरु. अहसू. ६.७२ )
कासविंदा.

**सृक्क**–न., शारीर० **ओष्ठपार्श्वयोः सन्धिभागः, षट्पञ्चाशत्प्रत्यङ्गेष्वेकम्** ( चशा. ७.११ )
ओठाच्या बाजूचा संधिभाग छप्पन्न प्रत्यंगांपैकी एक. ओठांचा कोपरा.

**सृक्कन्**–न., शारीर० **ओष्ठप्रान्तः** ( सुउ. १६.१० )
ओठाच्या कडा.

**सृक्कि**–स्त्री., शारीर० **सृक्क** ( चशा. ७.११ )
ओठांचा कोपरा.

**सृक्किणी**–स्त्री., शारीर० **ओष्ठप्रान्तः** ( सुउ. ६०.१३ )
ओठांचा कोपरा, ओठाची कडा.

**सृगालविन्ना**–स्त्री., वनस्पति० **पृश्निपर्णी** ( इन्दु.असंउ. ४ ) पिठवण.

**सृमर**–पु., **आनूपमृगः, महाशूकरः** ( चक्र. चसू. २७.३९ ) **कूलचरपशुः, अन्ये महाश्वाकारश्चमरानूकः** ( ड ) **गतिशीलो मृगभेदः, इति हाराणचन्द्रः** ( सुशा. ३.२७ ) **तन्मांसगुणाः– कषायानुरसं, वातपित्तोपशमनं, गुरु, शुक्रविवर्धनं च** ( सुसू. ४६.१०१ )
झाडी अधिक असलेल्या भागातील पशु. पाण्याच्या किनाऱ्याने संचार करणारा पशु, रानडुक्कर, मोठा डुक्कर; मोठ्या कुत्र्याच्या आकाराचा, हरणाच्या स्वभावाचा पशु. शीघ्रगतीचा हरीण. **मांसगुण**— तुरट अनुरस, वातपित्तशामक, जड, शुक्रवर्धक.

**सृष्ट**–वि., **निर्मितः** ( सुउ. ३९.१४४ )
निर्मिलेले. उत्पन्न–तयार केलेले.

**–दोष**–वि., **च्युतदोषः (पुरुषः)** (ड. सुउ. ३९.१४४)
ज्याचे दोष बाहेर गेलेले आहेत असा (पुरुष).

**–पुरीषता**–स्त्री., **पुरीषोत्सर्गः** ( सुउ. ३९.८५ )
मलाचा उत्सर्ग होणे, मळ सरणे.

**–मूत्रता**–स्त्री., **मूत्रस्योत्पत्तिः प्रवृत्तिश्च, मूत्रोत्सर्जनम्** ( सुउ. ३९.८५; अहसू. ५.४७ )
मूत्राची उत्पत्ति, प्रवृत्ति, उत्सर्जन.

**–मूत्रपुरीष**–वि., **मूत्रस्य पुरीषस्य च विसर्गकरम्** ( सुचि. ६.८ )
मळ–मूत्रांचे विसर्जन करणारे. मळमूत्र साफ करणारे.

**–शकृत्**–वि., **मलानुलोमनः, पुरीषोत्सर्जनकरः** ( अहसू. ५.४७ )
मळाचे विसर्जन करणारे, अनुलोम करणारे.

**(सृष्टि)**–स्त्री., पारदयोग० **गन्धकपारदाभ्रकयुक्तः कल्पः असौ अपस्मारनाशकः,** ( र. २४.२५ ) द्रवद्रव्य०, **गोऽजाऽविनरनारीणां मूत्रं शोणितं शुक्रं च** ( र. ११.४७ )
पाऱ्याचा योग. गंधक, अभ्रकयुक्त. हा अपस्मार-नाशक. पातळ द्रव्य. गाय, शेळी, मेंढी, मनुष्य, स्त्री यांचे मूत्र, रक्त, आणि शुक्र.

**सृष्टि**–स्त्री., **जगत् सृष्टि, जग.**

**–प्रदा**–स्त्री., वनस्पति० **पुत्रदा** ( रापरि. ४.२७; पृ. ३३७ )
हिच्या माळा गळ्यात घालतात. वांझकटोली, पांढरी रिंगणी.

**सेक**–पु., **सेचनम्** ( सुचि. २.२४ ) **धारासेकः** ( ड. सुउ. २६.५ ) **परिषेकः** ( अहसू. ३०.३८ )
सिंचन, धारा सिंचन, शिंपडणे, एकसारखी धार धरून शिंपडणे.

**सेगुरुन्दक**–धान्य० **जूर्णा०** ( रा. १६.१६९; पृ. २२९ )
ज्वारीचा प्रकार. एक प्रकारचा जोंधळा.

**सेतुबन्ध**–पु., **धरणबन्धः** ( असंशा. १२.४ )
धरणाचा बांध. बंधाऱ्याचा बांध, पुलाचा बांध.

**सेतुभङ्ग**–पु., **धरणभङ्गः** ( असंशा. १२.४ )
धरण फुटणे, धरणाचा बांध फुटणे.

**सेना**–स्त्री., **ग्रहमातृ०** ( असंउ. ४ )
एक बालग्रह.

**सेन्दिनी**–स्त्री., वनस्पति० **मृगाक्षी** ( रा. ७.२५८; पृ. ४२ ) लहान चिभडे.

**सेन्द्रिय**–वि., **चेतनम्** ( चशा. १.१३६ )
सचेतन, ज्ञानवान. इंद्रिये असलेले. अजड.

**सेलु**–स्त्री., वनस्पति० **वनमेथिका** ( ध. ६.११३; असंसू. ७.१२४-१२६; पृ. २३१ )
रानमेथी.

**सेवनी**–शारीर० सीवनी, तत्संख्या सप्त, पञ्च शिरसि, एका जिह्वायामेका शेफसि तत्र द्वे सेवन्यौ शिरसि शङ्खावाश्रित्य प्रवृत्ते, द्वे कृकाटिके, एकोपरिस्था ऋज्वीति पञ्च (इन्दु. असंशा. ५.८७) जिह्वाधोभागे जिह्वाग्रान्मूलपर्यन्तम् ( सुशा. ५.१५ ) मेढ्राद्वृद-द्वारपर्यन्तं गुदद्वाराद्वृदास्थिपर्यन्तं स्त्रीणां तु भग-स्थाने या सा योनिद्वाराद्गुदपर्यन्तं गुदात्पश्चाद्गु-दास्थिपर्यन्तं च ( सुशा. ५.१५ ) मेहनसीवनी-च्छेदः, छेदाद्रुजः प्रादुर्भावो भवति

( सुचि. ७.३६ )

शिवण. ह्या सात. पैकी ( १ ) डोक्यात पाच ( ५ ) जिभेत एक ( ३ ) शिश्नाखाली एक. १ डोक्यावर कानशिळावरून जाणाऱ्या दोन, कृकाटिका व एक वर सरळ जाणारी अशा पाच. २ जिव्हेच्या खालच्या भागात तिच्या टोकापासून मुळापर्यंत. ३ शिश्नाच्या खाली गुदद्वारापर्यंत. स्त्रीमध्ये योनिद्वारा पासून गुद-द्वारा पर्यंत. ही कापली गेली तर वेदना होते.

**सेवाली**–स्त्री., वनस्पति० आकाशमांसी ( रा. १२.९५; पृ. १०५ )

एक मांसी. आकाशमांसी. पर्वतात होणारी बारीक पानांची, पांढरी, एक प्रकारची जटामांसी.

**सेव्य**–पु., वनस्पति० पिप्पलः ( ध. ५.७९; पृ. १८५ )

पिंपळ.

न., वनस्पति० उशीरम् ( चचि. ६.५०; ( सुउ. ४२.११६ )

काळा वाळा.

**( सेव्या )**–स्त्री., वनस्पति० वासन्ती

( ध. ५.१३९; पृ. १९८ )

पांढरी जाई, नेवाळी, तेलमोगरी, कस्तुरमोगरी.

**सेहुण्ड**–पु., वनस्पति० स्नुक् ( रा. ८.३५५ पृ. ५६ )

त्रिधारी निवडुंग.

**सैंहलक**–पु., मिश्रधातु० पित्तलः (ध. ६.१९; पृ. २०९)

मिश्र धातु; पितळ.

**सैंहली**–स्त्री., वनस्पति० गजपिप्पली

( रा. ६.११९ पृ. ८५ )

गजपिंपळी.

**सैकतेष्ट**–न., वनस्पति०आर्द्रकम् ( ध. २.८४ पृ. ८७ )

आले.

**सैंदुक**–न., काष्ठमणि० सिंदुको निर्गुंडी, तत्काष्ठकृतं रुचकं; तत्फलकृतमित्यन्ये ( सुउ. ३१.७ )

सिंदुक म्हणजे निर्गुंडी तिच्या काड्यांच्या मण्यांचा हार, किंवा निर्गुंडी फळाच्या मण्याचा हार (एक मत)

**सैन्धव**–न., खनिज० लवणम् लवणानामग्र्यम् ( चसू. २५.३७ ) सिन्धुदेशोत्थ–खनिज० ( सुसू. ३७.१९ ) हितत्वेनाभ्यसनीयमेकं द्रव्यम् ( चसू. ५.१२ ) तद्गुणाः– मधुरं; लवणं ( रा ) शीतम्; स्निग्धम्, लघु, स्वादुपाकि, हृद्यं, वृष्यं, रोचनं, दीपनं, चक्षुष्यं, त्रिदोषघ्नम् (सुसू. ४६.३१४) हृद्रोगनेत्ररोगव्रणारोचकनाशनम् ( ध. २.२५; रा. ६.२३; पृ. ७३ ) हिक्कानाशनम् (सुउ. ५०.२४) इदं कफविलयनं कफच्छेदनं च करोति

( असंसू. ११.२२ )

हिं.—सेंधानोन.

**म.—शेन्दे लोण.**

गु.—सिन्धालूण.

बं.—सैन्धवलवण.

ता.—इन्तुप्पु.

सैंधव. सर्व मिठात श्रेष्ठ. सिंधदेशात ते खाणीत सापडणारे. शरिराला हितकर म्हणून नित्य सेवनीय द्रव्य. गुण—खारट, गोड, पचल्यावर गोड, थंड, स्निग्ध, हलके शुक्र डोळे व हृदयाला हितकर, रुचकर, दीपक, त्रिदोषनाशक. हृद्रोग, नेत्ररोग, व्रण, अरुचि, उचकी नाशक. कफाला पातळ व त्याचा नाश करणारे.

देश० ( चवि. १.१८ ) सिंधप्रांत.

**–सिद्धतैल**–न., तैल० ( चसि. ४.१३-१७ )

सैंधवाने सिद्ध केलेले तेल.

**सैन्धवादिचूर्ण**–न., योग० तद्गुणाः–रोचनं, दीपनं, बल्यं पार्श्वार्तिश्वासकासनुच्च ( चचि. ११.८५-८७ )

एक योग. गुण—रुचकर, दीपक, बलवर्धक; श्वास, खोकला, फासळ्यातील शूल नाशक.

**सैन्धवादिसिद्धपयस्**–न., वाताभिष्यन्दे सेके आश्च्योतने वा हितकरम् ( सुउ. ९.१२-१३ )

सैंधवादी औषधांनी सिद्ध केलेले दूध. वातामुळे डोळे आले असता सिंचन व घड्या ठेवण्याने हितावह.

**सैन्धवाद्यञ्जन**–न., अञ्जन० शुष्काक्षिपाके उपयुक्तम् ( सुउ. ९.२० )

सैंधवादी औषधांनी सिद्ध केलेले अंजन. हे शुष्क-अक्षिपाक नावाच्या डोळ्याच्या विकारात उपयुक्त.

**सैरीय**–पु., वनस्पति० कुरण्टकः ( सुचि. २५.३२ )

कोन्हांटा.

**सैरीयादितैल**–न., तैल० खलतितपलितघ्नम्
( सुचि. २५.३२-३७ )
कोन्हांटी वगैरे औषधांनी सिद्ध केलेले तेल. हे डोक्याला टक्कल पडणे व केस पांढरे होणे ह्या विकारावर उपयुक्त.

**सैरीयक**-पु., न., वनस्पति० श्वेतकुरण्टकः द्र० 'कुरण्टक'
( सुसू. ३८.७३; असंउ. २८ )
पांढरा कोन्हांटा.

**सैरेय**–पु., वनस्पति० कुरण्टकः
( चसू. १४.३२; ध. १.२७८ पृ. ६३ )
कोन्हांटी.

**सैरेयक**–पु., न. वनस्पति० कुरण्टकः
( र. २८.८९; ध. १.२७८; सुचि. पृ. ६३ )
कोन्हांटी.
**झिण्टी** पु., ( र. २८.८९ )
एक वनस्पती.
**कीट० तद्गुणाः**–असौ सौम्यः श्लेष्मप्रकोपणश्च कफविकारान् करोति ( सुक. ८.१२-१५ )
एक किडा. हा सौम्य, कफप्रकोपक, कफ विकार करतो.
**–द्वय**–न., वनस्पति० रक्तपुष्पनीलपुष्पकण्टशेलुयाद्वयम् द्र० 'कुरण्टक०' ( सु सू. ३८.१०-११ )
लाल व निळी कोन्हांटी.

**सैर्यक**–पु., वनस्पति० कुरण्टकः ( अहसू. १५.१७ )
कोन्हांटी.
**–युग्म**–न., वनस्पति० सैरेयकद्वयम् द्र० 'कुरण्टक'
( असंसू. १६.१५ )
कोन्हांटी जोडी.

**सैहल**–न., वनस्पति० त्वक् (ध. २.५०; पृ. ७९) साल.

**सोच्छ्वास**–वि., अनवगाढः ( बन्धः ) शिथिलः
( सुसू. १८.२३ )
वातसंचारी, हवा खेळती राहील असा ढिला, सैल. ( व्रणाचा पट्टा )

**सोत्थान**–न., अनिरुत्थम्, अमृतम् ( र. २८.१५ )
न मेलेले, भस्मातून पुन्हा धातु निघणारे.
**–लोहमारण**–न., उत्थितं लोहं मुहुर्मुहुस्त्रिफलाक्वाथेन पुटनम् ( र. २८.१८ )
भस्मातून निघालेला धातु. ( लोह ) पुनःपुन्हा त्रिफळेच्या काढ्याने भावना देऊन पुट देणे.

**सोपसर्गा**–वि., सोपद्रवा ( चसू. १३.७१ )
उपद्रवासह.

**सोपान**–न., आरोहणम् ( असंसू. ४.४० )
आरोहण, वर बसणे. जिना, शिडी, पायरी.

**सोम**–पु., वनस्पति० सोमवल्ली, ओषधीनां श्रेष्ठः ( चसू. २५.४० ) सोमनामिकाया लताया दश पञ्च च पत्राणि भवन्ति। तानि पत्राणि शुक्लपक्षे, प्रत्यहमेकैकं पत्रं जायते। पौर्णमास्यां तिथौ सोमः पञ्चदशच्छदात्मको भवति। कृष्णपक्षे प्रतिदिनमेकैकं पत्रं शीर्यते। अमावास्यायां तिथौ सोमः पत्रविहीनः केवललतारूपात्मको भवति
( सुचि. २९.२०-२२ ) एक एव खलु भगवान् सोमः स्थाननामाकृतिवीर्यविशेषैश्च चतुर्विंशतिधा भिद्यते। ते चांशुमान् मुञ्जवांश्चन्द्रमा रजतप्रभो दूर्वासोमः कनीयान् श्वेताक्षः कनकप्रभः प्रतानवांस्तालवृन्तः करवीरोंऽशवान्, स्वयंप्रभो महासोमो गरुडाहृतो गायत्रस्त्रैष्टुभः पाङ्क्तो जागतः शाक्वरोऽग्निष्टोमो रैवतस्त्रिपदा गायत्र्या युक्त उडुपतिरुच्यते ( सुचि. २९.५-८ ) अतोऽन्यतमं सोममुपयुयुक्षुः सर्वोपकरणपरिचारकोपेतः प्रशस्ते देशे त्रिवृतमागारं कारयित्वा हृतदोषः प्रतिसंसृष्टभक्तः प्रशस्तेषु तिथिकरणमुहूर्तनक्षत्रेषु अंशुमन्तमादायाध्वरकल्पेनाहृतमभिषुतमभिहुतं चान्तरागारे कृतमङ्गलस्वस्तिवाचनः सोमकन्दं सुवर्णसूच्या विदार्य पयो गृह्णीयात् सौवर्णे राजते वा पात्रेऽञ्जलिमात्रं, ततः सकृदेवोपयुञ्जीत नास्वादयन्, तत उपस्पृश्य शेषमप्स्ववसाद्य यमनियमाभ्यामात्मानं संयोज्य वाग्यतोऽभ्यन्तरतः सुहृद्भिरुपास्यमानो विहरेत्। निवाते रसायनं पीतवांस्तु तन्मनाः शुचिः आसीत न कथंचन संविशेत्। सायं वा भुक्तवानुपश्रुतशान्तिः कुशशय्यायां कृष्णाजिनोत्तरायां सुहृद्भिरुपास्यमानः शयीत, तृषितो वा शीतोदकमात्रां पिबेत्; ततः प्रातरुत्थायोपश्रुतशान्तिः कृतमङ्गलो गां स्पृष्ट्वा तथैवासीत, तस्य जीर्णे सोमे छर्दिरुत्पद्यते, ततः शोणिताक्तं कृमिव्यामिश्रं छर्दितवते सायं शृतशीतं क्षीरं वितरेत्, ततस्तृतीयेऽहनि कृमिव्यामिश्रमतिसार्यते, स तेनानिष्टप्रतिग्रहभुक्तप्रभृतिभिर्विशेषैर्विनिर्मुक्तः शुद्धतनुर्भवति, ततः सायं स्नाताय पूर्ववदेव क्षीरं वितरेत्, क्षौमवस्त्रास्तृतायां चैनं शय्यायां शाययेत्; ततश्चतुर्थेऽहनि तस्य श्वयथुरुत्पद्यते, ततः सर्वाङ्गेभ्यः कृमयो निष्क्रामन्ति, तदहश्च शय्यायां पांशुभिरवकीर्यमाण,

शयीत, ततः सायं पूर्ववदेव क्षीरं वितरेत्। एवं पञ्चमषष्ठयोर्दिवसयोर्वर्तेत, केवलमुभयकालमस्मै क्षीरं वितरेत्; ततः सप्तमेऽहनि निर्मांसस्त्वगस्थिभूतः केवलं सोमपरिग्रहादेवोच्छ्वसिति तदहश्च क्षीरेण सुखोष्णेन परिषिच्य तिलमधुकचन्दनानुलिप्तदेहं पयः पाययेत्; ततोऽष्टमेऽहनि प्रातरेव क्षीरपरिषिक्तं चन्दनप्रदिग्धगात्रं पयः पाययित्वा पांशुशय्यां समुत्सृज्य क्षौमवस्त्रास्तृतायां शय्यायां शाययेत्, ततोऽस्य मांसमाप्यायते, त्वक् चावदलति, दन्तनखरोमाणि चास्य पतन्ति; तस्य नवमदिवसात्प्रभृत्यणुतैलाभ्यङ्गः सोमवल्ककषायपरिषेकः; ततो दशमेऽहन्येतदेव वितरेत्, ततोऽस्य त्वक् स्थिरतामुपैति; एवमेकादशद्वादशयोर्वर्तेत; ततस्त्रयोदशात्प्रभृति सोमवल्ककषायपरिषेकः, एवमाषोडशाद्वर्तेत; ततः सप्तदशाष्टादशयोर्दिवसयोर्दशना जायन्ते शिखरिणः स्निग्धवज्रवैदूर्यस्फटिकप्रकाशाः समाः स्थिराः सहिष्णवः, तदा प्रभृति चानवैः शालितण्डुलैः क्षीरयवागूमुपसेवेत यावत्पञ्चविंशतिरिति; ततोऽस्मै दद्याच्छाल्योदनं मृदूभयकालं पयसा, ततोऽस्य नखा जायन्ते विद्रुमेन्द्रगोपकतरुणादित्यप्रकाशाः, स्थिराः स्निग्धा लक्षणसंपन्नाः केशाश्च सूक्ष्मा जायन्ते, त्वक् च नीलोत्पलातसीपुष्पवैदूर्यप्रकाशा ऊर्ध्वं च मासात्केशान्वापयेत्, वापयित्वा चोशीरचन्दनकृष्णतिलकल्कैः शिरः प्रदिह्यात् पयसा वा स्नापयेत्; ततोऽस्यानन्तरं सप्तरात्रात्केशा जायन्ते भ्रमराञ्जननिभाः कुञ्चिताः स्थिराः स्निग्धाः; ततस्त्रिरात्रात् प्रथमावसथपरिसरान्निष्क्रम्य मुहूर्तं स्थित्वा पुनरेवान्तः प्रविशेत्, ततोऽस्य बलातैलमभ्यङ्गार्थेऽवचार्यं, यवपिष्टमुद्वर्तनार्थे, सुखोष्णं च पयः परिषेकार्थे, अजकर्णकषायमुत्सादनार्थे, सोशीरं कूपोदकं स्नानार्थे, चन्दनमनुलेपार्थे, आमलकरसविमिश्राश्चास्य यूषसूपविकल्पाः, क्षीरमधुकसिद्धं च कृष्णतिलमवचारणार्थे, एवं दशरात्रम्; ततोऽन्यद्दशरात्रं द्वितीये परिसरे वतत; ततस्तृतीये परिसरे स्थिरीकुर्वन्नात्मानमन्यद्दशरात्रमासीत, किञ्चिदातपवनान् वा सेवेत, पुनश्चान्तः प्रविशेत्, न चात्मानमादर्शेऽप्सु वा निरीक्षेत रूपशालित्वात्; ततोऽन्यद्दशरात्रं क्रोधादीन् परिहरेत्, एवं सर्वेषामुपयोगविकल्पः। विशेषतस्तु वल्लीप्रतानक्षुपादयः सोमा ब्राह्मणक्षत्रियवैश्यैर्भक्षयितव्याः। तेषां तु प्रमाणमर्धचतुष्कमुष्टयः (सुचि. २९.१०-१२) **सोमगुणाः— विचक्षणः सोममुपयुज्य दशवर्षसहस्राणि नवां तनुं धारयते। अग्नितोयविषशस्त्रास्त्राणि तस्यायुःक्षपणे समर्थानि न भवन्ति। रूपेण कन्दर्प इव, कान्त्याऽपरश्चन्द्र इव महाद्युतिः स भूतानां मनांसि प्रह्लादयति। साङ्गोपाङ्गान् निखिलान् वेदान् तत्वतो विन्दति (सुचि. २९.१४-१९)**

सोमवल्ली. औषधीत श्रेष्ठ. हिला पंधरा पाने जास्तीत जास्त येतात, ती शुक्लपक्षात येतात. दररोज एक अशी प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत क्रमाने १५ येतात व पौर्णिमेच्या दिवशी ती १५ पानांची होते. कृष्णपक्षात प्रत्येक दिवशी एकेक अशी अमावास्येपर्यंत सर्व पाने गळून पडतात व अमावास्येला एक ही पान नसलेली लतारूपात्मक असते. ही वनस्पती स्थान, आकृती, तिचे वीर्य व नाव या दृष्टीने २४ प्रकारची आहे. अंशुमान इत्यादी तिची नावे आहेत.

**सेवनविधि**— सोम रसायन घेऊ इच्छिणाऱ्याने प्रशस्त अशा भागात तीन परिसराचे घर बांधावे. जवळ सर्व औषधि, उपकरणे असावीत. पंचकर्मांनी शरीर शुद्ध करून, क्रमाने नेहमीच्या अन्नावर आल्यानंतर प्रशस्त अशा तिथि, करण, मुहूर्त, नक्षत्र, दिवशी अंशुमान नावाचा सोम घेऊन यावा, यज्ञविधी प्रमाणे तो घेऊन ठेचून अग्नीला आहुती देऊन, आतल्या घरात मंगल पुण्याहवाचन इत्यादी करून सोमाचा कंद सोन्याच्या सुईने टोचून त्याचे दूध सोन्याच्या किंवा चांदीच्या भांड्यात घ्यावे. व ते एकदम प्यावे, स्वाद घेऊ नये, नंतर तोंड स्वच्छ करावे, शिल्लक पाण्यात टाकावे. वैद्यांनी दिलेल्या आदेशाप्रमाणे सर्व यमनियम पाळावेत, मनोनिग्रहाने मौन पाळून अंतर्गृहात मित्राबरोबर फिरावे, त्याने निवाऱ्याच्या जागेत शुद्ध असावे, व सर्व लक्ष्य शरिराकडे व सोमाकडे असावे. त्याने झोपू नये. रात्री जेवण झाल्यावर शांतीचे मंत्र ऐकून दर्भांच्या चटईवर काळ्या हरिणाचे कातडे आंथरून त्यावर मित्रासमवेत गप्पागोष्टी ऐकत निजावे. तहान लागली तर बेताने थंड पाणी प्यावे. दुसऱ्या दिवशी उठल्यावर शांतीचे मंत्र ऐकून, मंगल विधि- करून गाईला स्पर्श करून बसावे, सोम जीर्ण झाल्या-

वर ओकारी येते. ती रक्तमिश्र, कृमिमिश्र ओकारी झाल्यावर सायंकाळी तापवून थंड केलेले दूध पिण्यास द्यावे. नंतर तिसऱ्या दिवशी कृमियुक्त रेच होतात. यामुळे अनिष्ट भोजन इत्यादीजन्य झालेल्या दोषांपासून तो मुक्त होतो व शुद्ध शरिराचा होतो. नंतर त्याने सायंकाळी स्नानकरून पूर्वी प्रमाणे दूध प्यावे. नंतर रेशीम किंवा तागाच्या मऊ वस्त्रांच्या आंथरुणाच्या शय्येवर निजावे. चवथ्या दिवशी त्याला सूज येते, आणि सर्वांगातून कृमि बाहेर पडतात. त्या दिवशी शय्येवर धूळ पसरवून तिच्यावर निजावे व सायंकाळी पूर्वीप्रमाणेच दूध प्यावे असेच पाचव्या सहाव्या दिवशी वागावे, दोन्ही वेळा दूध द्यावे. सातव्या दिवशी तो केवळ मांस नसलेला त्वचा हाडे फक्त असलेला केवळ सोम घेतले असल्यामुळेच श्वासोच्छ्वास करू शकतो. त्या दिवशी कोमट दुधाने त्याला शिंपून तीळ ज्येष्ठमध, चंदन यांचे उटणे लावून दूध पाजावे, नंतर आठव्या दिवशी सकाळीच दूध शिंपडून चंदनाचा लेप करून दूध पाजून धुळीची शय्या टाकून रेशमी चादर आंथरलेल्या गादीवर त्याला निजवावे. नंतर त्याचे मांस भरू लागते. त्वचा व नख, केश गळू लागतात. नवव्या दिवसापासून अणुतेलाचा अभ्यंग, सोमाच्या काढ्याचे शिंपण करावे. दहाव्या दिवशी असेच करावे, नंतर त्यांची त्वचा स्थिर होते. अकरावा, बारावा दिवस असेच चालू द्यावे, नंतर तेराव्या दिवसापासून सोमाच्या काढयाचे सिंचन करावे. याप्रमाणे सोळाव्या दिवसापर्यंत करावे. सतराव्या, अठराव्या दिवशी दात येतात. ते दात स्निग्ध, सारखे स्थिर बळकट टोके असलेले, हिरा वैडूर्य स्फटिक मण्या सारखे पांढरे स्वच्छ व चमकदार असतात. तेव्हापासून जुन्या साळीच्या भाताची दूध घालून केलेली पेज-यवागू द्यावी. पंचवीस दिवसा पर्यंत असे करावे. नंतर त्याला जुना साळीचा मऊ भात दोन्ही वेळेला दुधाबरोबर द्यावा. नंतर नखे येतात. प्रवाळ, मृगकिडे, उगवता सूर्य यांच्या सारखे लाल व चमकदार स्थिर व स्निग्ध सर्व सुलक्षण संपन्न ती असतात. सूक्ष्म केस उत्पन्न होतात. त्वचा निळे कमळ, आळशीचे फूल, वैडूर्यमणी या सारखी श्याम व तेजस्वी आणि सुकुमार होते. महिन्यानंतर केस कापावेत. नंतर काळा वाळा चंदन, काळे तीळ यांच्या चटणीने डोके माखावे किंवा दुधाने धुवावेत, सात दिवसांनी केस भुंग्यासारखे काळे, कुरळे, स्थिर, स्निग्ध होतात. नंतर तीन दिवसांनी अंतर्गृहातून मध्य गृहात यावे व २०-२५ मिनिटे थांबून पुन्हा आत जावे. अभ्यंगाकरिता बला तैल, उटण्याकरिता जवाचे पीठ, सिंचना करिता कोमट दूध, मेंढशिंगीची चटणी अंगाला चोळण्यास, काळा वाळायुक्त आडाचे पाणी स्नानाकरिता, चंदन स्नानानंतर अंगाला लावण्या करिता, आवळ्याचा रस मिश्र केलेले सार कढणे मांस रस भोजनामध्ये कालवणाकरिता, दूध ज्येष्ठमध यांबरोबर शिजवलेले काळे तीळ मधून उपयोगाकरिता असावेत. प्रमाणे या दहा रात्री घालवाव्यात, त्या नंतर दहा रात्री मधल्या घरात घालावाव्या. नंतर बाहेरच्या घरात (ओसरीत) आपले शरीर, मन यांना स्थिर करून आणखी दहा दिवस असावे. मधून मधून थोडे ऊन किंवा थोडा वारा सेवन करावा. पुन्हा अंतर्गृहात जावे. आरशात वा पाण्यात आपले प्रतिबिंब पाहू नये. कारण पुन्हा नवे उत्पन्न झालेले शरीर हे रूपसंपन्न झालेले असते. या नंतर आणखी दहा दिवस राग इत्यादी येऊ देऊ नये. याविधी प्रमाणे सर्व सोम वनस्पतीचा उपयोग करावा. विशेष असा की १ वेल २ शाखा असलेले ३ लहान रोपटी असलेले सोम क्रमाने विद्याराधन करणाऱ्या ब्राह्मण क्षत्रिय आणि वैश्य वृत्तीच्या लोकानी सेवन करावे. प्रमाण ४।। पळे म्हणजे १८ तोळे. **सोमाचे गुण**—जो वरील, विधीप्रमाणे सोमाचा उपयोग करतो तो दहा हजार वर्षे नवे शरीर धारण करतो. अग्नी, पाणी, विष, शस्त्रे, व अस्त्रे यांचा उपसर्ग झाला तरी त्याचे आयुष्य क्षीण होऊ शकत नाही. ही तो सहज सहन करून पचवू शकतो. तो रूपाने मदनासारखा सुंदर कांतीने दुसरा तेजस्वी चंद्रच. त्याला पाहाणाराच्या मनाला आल्हाद होतो, तो सांगोपाग सर्व वेद तत्वतः जाणतो.

**गुडूची** (ड. सुक. १.३७) गुळवेल.

**कङ्कोलः** (ड. सुचि. १८.३३) कंकोळ.

**कट्फल** (जेज्जटाचार्यः, सुचि. १७.२०–२१) कायफळ.

**ब्राह्मी** (सुसू. ३७.२४) ब्राह्मी,

**बाकुची** ( र. २०.२०३ ) बावची.
**सोमवल्कः** ( सुक. ६.३) कायफळ, शेण्याखैर.
**जलम्** ( चसू. ५.६ ) पाणी.
**याग०** ( असंसू. ९.११५ ) यज्ञ.
**देवता०** (चचि. ३.८२) **चन्द्रमाः, आकाशस्थग्रहः** ( चसू. ६.५; सुसू.२१.८ )
चंद्र. आकाशातील ग्रह.
**दोष० कफ** ( सुशा. ४.३ ) कफदोष.
वि., **सह उमया इति० सोमः उमासहितः ( देवः शिवः)** ( चक्र. जेज्जटः, चचि. ३.३१०–११ )
उमेसह असलेला ( शंकर ).
**प्राणेष्वेकः, सोमश्च सौम्यधातोरोजप्रभृतेः पोषणेन प्राणयति** ( सुशा. ४.३ )
सोम नावाचा प्राण. एक प्राण. सौम्य धातु, ओज इत्यादींना पोषण करून जगविणारा.
**श्लेष्मरसशुक्रादीनां तोयात्मकानां भावानां रसनेन्द्रियस्य च शक्तिरूपतयाऽवस्थितः** ( सुशा. ४.३ ) **मनसोऽधिदेवत्वमापन्नः सोम इति**
कफ, रस, शुक्र, इत्यादी जलात्मक शरीर घटकांना व रसनेन्द्रियाला शक्ति देणारा असा शारीर भाव. मनाचे आधिदैवत.

**( सोमा )**–स्त्री., **वनस्पति० सोमः** ( रापरि. ३.३०; पृ. ३३१ )
सोम महौषधी.
**ब्राह्मी** ( असंसू. ८.२५; ध. ४.१००; पृ. १५४)
ब्राह्मी.
**चन्द्रतरुः** ( असंउ. ४० )
एक वनस्पती. महासोमवल्लीचे एक नाव.

**–क्षीरा**–स्त्री., **वनस्पति० सोमः** ( रापरि. ३.३०; पृ. ३३१ )
सोम महौषधी.

**–क्षीरी**–स्त्री., **वनस्पति० सोमः** ( धपरि. ४.४; पृ. १६८ )
सोम महौषधी.

**–देव**–पु., **ऋषि० प्राचीनो रसाचार्यः** ( र. ८.२३९ ) **रसेन्द्रचूडामणिकर्ता** ( र. ८.९९ )
प्राचीन रसशास्त्रवेत्ता. रसेन्द्रचूडामणिकर्ता.

**–नाथ**–पु., **ऋषि० प्राचीनो रसाचार्यः** ( र. ५.७२ )
प्राचीन रसशास्त्र वेत्ता.



**–नालयन्त्र**–न., **यन्त्र० सोमानलयन्त्रम् तदिदमभ्रादिजारणार्थमुपयुज्यते** ( र. ९.२९ )
सोमानल यंत्र. अभ्रक इत्यादी पाऱ्यामध्ये जिरविण्यास उपयुक्त.

**–राजी**–स्त्री., **वनस्पति० बाकुची** ( ध. १.१६५; चसू. २.२४; सुक. ६.१४-२७, प. ३८ )
बावची.

**–रोग**–पु.,**रोग० स्त्रीरोगविशेषः, तत्संप्राप्तिः–व्यवायाधिक्यशोकगरादिकारणैःसर्वशरीरस्थोऽब्धातुःक्षुब्धो भवति, तेनातिश्वेतस्रावो भवति। वेगधारणमपि अशक्यं जायते। तल्लक्षणानि–शिरःशिथिलता, मुखतालुशोषः, मूर्च्छा, जृम्भा, प्रलापोऽतितृष्णातिबुभुक्षा, रूक्षा त्वक्** ( मा परि ) **चरके त्रिदोषप्रदरेऽन्तर्भावितोऽयं व्याधिः** ( मा परि. )
एक रोग. **संप्राप्ती**— अतिसंभोग, शोक, कृत्रिम विष इत्यादी कारणांनी सर्व शरिरातील जल धातु कुपित होतो व त्यामुळे योनिमार्गाने अति पांढरा स्राव होतो. मळादिकांचा वेग आवरणे अशक्य होते.
**लक्षणे**— डोके ढिले, तोंड व टाळू सुकणे, मूर्च्छा, जांभई, बडबड, अतिशय तहान व भूक आणि रूक्ष कातडी. चरकात याचा त्रिदोषज प्रदरात समावेश केला आहे.

**–लता**–स्त्री.,**वनस्पति० ब्राह्मी** (रा. ५.१४८; पृ. १५४)
ब्राह्मी.

**–लतिका**–स्त्री., **वनस्पति० गुडूची** (रा. ३.१ पृ. ८)
गुळवेल.

**–वल्क**–पु., **वनस्पति० कट्फलत्वक्** (सुसू. ३७.२४, इंदुः असंउ. ४६; ध. १.७३; पृ. २१ )
कायफळाचे टरफल.
**खदिरः** (चसू. ४.१५; ध. १.२७ पृ. १२ ) खैर.
**रीठाकरञ्जः** ( रा. ९.१८७ ) रिठा.
**श्वेतखदिरः** (चक.१.२२;सुचि.२९.१२) पांढरा खैर.
**विट्खदिरः**, (चक्र. चसि. १०.४३) **द्र० ' खदिर '**
शेण्या खैर.
**कट्फलः** ( सुक. ३.९-१० ) एक वनस्पती.

**–वल्लरी**–स्त्री., **वनस्पति० ब्राह्मी** ( रा. परि. ५.४१; पृ. ३४३ )
ब्राह्मी.

**–वल्ली**–स्त्री., **वनस्पति० तद्गुणाः–कटुस्तिक्ता मधुरा, शीता, रसायनी, त्रिदोषघ्नी, दाहतृष्णाविशोषशमनी**

( धपरि. ४.४; पृ. १६८ रापरि.३.२९; पृ३३१)
सोमवल्ली. गुण— तिखट, कडु, गोड, थंड, धातु-पोषक, त्रिदोषनाशक; दाह, तहान, शोषशामक.

**वत्सादनी** ( रा परि. ३.३२ पृ. ३३२ )
लांब व बळकट कांड्याची लांब वेल.

**बाकुची** ( ध. १.१६५; पृ. ३८ ) बावची.

**गुडूची** (ध. १.२; सुक. १.५१-५४ पृ. ८) गुळवेल.

**ब्राह्मी** ( असंसू. ८.४२ ) ब्राह्मी.

**–सार**–पु., **सोमवल्कः. खदिरभेदः द्र० ' खदिर '** ( रा. ८.३४; पृ. १२ )
खैराचा प्रकार. पहा ' खदिर '.

**–सूद्मा**–स्त्री., **वनस्पति० कूष्माण्डिका, त्रपुसभेदः, द्र० ' त्रपुस '** ( ध. १.१८३; पृ. ४३ )
कोहळा, भुरा कोहळा.

**–सेनानी**–पु., **सत्यवाक्प्रभृतीनामेकतमोऽयं प्राचीनो रसाचार्यः** ( र. ४.४३ ) प्राचीन रसशास्त्रवेत्ता.

**सोमातिपतित**–वि., **सोमस्यातिपानेन पतितः, ( शक्रः )** (चवि.२४.४) सोम अति प्याल्याने ओजक्षीण (इंद्र).

**सोमात्मक**–वि., **सौम्यम् सोमाधिष्ठितम्, सोमगुणप्रधानम्** ( सुसू. १५.२१-२२ )
सौम्य, सोमगुणप्रधान. सोममय.

**सोमानलयन्त्र**–न., **यन्त्र० जलमध्यखर्परे बिडयुक्तपारदसहितां मूषां स्थापयित्वा तदुपरि चाग्निं प्रज्वालयेदित्येतत् अभ्रकादिजारणार्थमुपयुज्यते** ( र. ९.२९ )
पाण्यामध्ये खापर ठेवून त्यात बिडयुक्त पारद असलेली मूस ठेवून तिच्यावर अग्नि पेटवावा. हे यंत्र अभ्रक इत्यादी जारण करण्यास उपयुक्त.

**सोमाभिपतित**–वि., **सोमाभिपतनयोगेन सोमपानातियोगेन पीडितः ( चन्द्रः )** ( चचि. १(४).४३ )
सोमाच्याअति पानाने पीडित. (चंद्र).

**सोमार्हा**–स्त्री., **वनस्पति० सोमवल्ली** ( रापरि. ३.२९; पृ. ३३१ )
सोमवल्ली.

**सौकरपुट**–न., **लेपवेधोपयोगि वराहपुटम्** ( र. ८.९० )
डुक्करपुट, वराहपुट. पाऱ्याच्या लेप व वेधास उपयोगी.

**सौकरी**–स्त्री., **वनस्पति० वाराहीकन्दः** ( ध. ४.९२; पृ. १५२ )
डुक्करकंद.

**सौकुमार्य**–न., **सुकुमारत्वम्, सुकोमलता** ( अहसू. ५.३७ )
सुकोमलत्व. अतिकोवळेपणा, अतिनाजुकपणा, सुकुमारत्व.

**सौकुमार्यार्थिन्**–वि., **सुकुमारत्वकांक्षिणः, सुकुमारस्य भावः सौकुमार्यम्, तस्यार्थी** ( चसू. १३.४२ )
सुकुमारत्व इच्छिणारा.

**सौक्ष्म्य**–न., **सूक्ष्मत्वम्, अणुत्वम्** ( सुउ. ३९.६५ )
सूक्ष्मत्व, अणुत्व.

**सौगन्धिक**–पु., **कफजः क्रिमिविशेषः** ( चसू. १९.४(९)
एक कफज क्रिमि प्रकार.

**वनस्पति० शुन्धी, कमलभेदः द्र० 'कमल'** ( चसू. ४.१५ )
कमळाचा प्रकार. पहा ' कमल '

**नीलपद्मम्** ( ध. ४.१५०; सुसू. ३८.५२-५३; पृ. १६४ )
निळे कमळ.

**रत्न० माणिक्यभेदः** ( चचि. १७.१२६ )
माणिक रत्नाचा ( लाल ) प्रकार.

**खनिज० गन्धकः, गन्धतृणं वा** ( चक्र. चसू. ३.१० )
गंधक, रोहिसगवत.

**नपुंसकविशेषः, षण्ढः, नासायोनिः, यः पूतियोनौ जायेत, योनिशेफसोर्गन्धमाघ्राय बलं लब्ध्वा मैथुनक्षमो जायते सः** ( सुशा. २.३९; असंशा. २.४४ )
एक नपुसकप्रकार षंढ. जो दुष्ट योनीपासून होतो. योनी व शिश्न यांचा वास घेतल्यावर ज्याला संभोगाचे बल येते व मैथुन करू शकतो तो.

**सौत्रामणी**–स्त्री., **यज्ञ० तत्र सुरा हूयते** (चिच. २४.३)
ज्या यज्ञात दारूचे हवन होते.

**सौध**–न., **सुधाधवलितगृहम्, धवलगृहम्** ( अहसू. १३.६ )
गच्ची. चुन्याने रंगवून पांढरे केलेले घर.

**खनिज० रौप्यम्** (ध. ६. ५; पृ.२०६) रुपे. चांदी.

**–पयस्**–न., **सेहुण्डभवं पयः, तद्गुणः—तीक्ष्णविरेचनम्** ( सुसू. ४४.७८ )
निवडुंगाचे दूध. गुण— तीव्र विरेचन.

**सौप**–पु., **उपकरणभूतद्रव्यसाधकः, सूपव्यञ्जनादिकारकः, महानसनियुक्तपरिचारकान्यतमोऽयम्** ( सुक. १.१७-१८ )

सूप, आमटी, मांसरस, चटण्या, कोशिंबिरी इत्यादी आजुबाजूचे खाण्याचे, तोंडी लावण्याचे पदार्थ करणारा स्वयंपाकी. मुख्य स्वयंपाक्याचा मदतनीस.

**सौपर्ण**-वि., **सुपर्णस्येदम्** ( **गारुडचक्षुरिव तिग्मदृष्टिकम्** ) ( सुचि. २७.१२; असंउ. १६ )
गरुड दृष्टीचा. सूक्ष्म व दूर दृष्टीचा.
**न., रत्न० गारुत्मतम्** ( ध. ६.४९; पृ. २१६ )
पाच. पाचू.
**वनस्पति० शुण्ठी** ( रा. ६.१३०; पृ. ८७ ) सुंठ.

**( सौपर्णी )**-स्त्री., **वनस्पति० वत्सादनी** ( रापरि. ३.३२; पृ. ३३२ )
लांब व बळकट कांड्याची लांब वेल. पाताळ गारुडी.

**सौभाग्य**-न., **खनिज० सिन्दूरम्** ( रा. १२.१६१; पृ. ११६ )
शेंदूर.
**खनिज० टङ्कणः** ( र. २.२५ ) टाकणखार.

**-लोभ**-पु., **सौभाग्यस्य लोभः** ( असंसू. ८.३ )
सौभाग्याचा लोभ.

**-शुण्ठी**-स्त्री., **अवलेहविशेषः द्वात्रिंशत्तोलकमानेन जलेनाढकमितं दुग्धं तुलार्धमानां च शर्करां मिश्रयित्वा दर्वीप्रलेप्यवलेहं कुर्यात्तत्र चैलाकण्टकारिकाविडङ्गत्रिकटुजीरकदीप्यकभृङ्गलवङ्गबोलान्प्रत्येकं पलमात्रं, मिशिं पञ्चपलं, धान्यं पलत्रयं शुण्ठीमष्टपलां च चूर्णयित्वा प्रक्षेपयेत्। असाववलेहविशेषः सूतिकारोगान्विशेषतो ज्वरप्लीहमलस्तम्भगुल्मकासश्वासाग्निमान्द्यान्नाशयति** ( र. २२.११७-२२ )

**सौभाग्य सुंठ**-एक चाटण. ३२ तोळे पाणी २५६ तोळे दूध, २०० तोळे साखर घालून पळीस चिकटेल असा अवलेह करून त्यात वेलदोडा, रिंगणी, वावडिंग, सुंठ, मिरी, पिंपळी, जिरे, ओवा, माका, लवंग, बोळ, प्रत्येकी चार चार तोळे; बडिशेप वीस तोळे; धणे तीन पळे ( १२ तोळे ) सुंठ ३२ तोळे वस्त्रगाळ चूर्ण टाकावे. हे चाटण बाळंतरोग विशेषतः ज्वर, प्लीहा, मलावरोध, गुल्म, खोकला, श्वास, अग्निमांद्य नाशक.

**सौभाञ्जन**-पु., **वनस्पति० शिग्रुः** ( ध. ४.४०; पृ. १४२ )
शेवगा,

**सौभाञ्जनक**-पु., **वनस्पति० शोभाञ्जनः द्र० 'शिग्रु'** ( असंसू. १५.२७ )
शेवगा, पहा 'शिग्रु'.

**सौमनस**-पु., **जातीपुष्पकृतः कषायः** ( सुउ. ३९.२६९)
जाईच्या फुलांचा काढा.
**न., वनस्पति० जातीफलम्** ( ध. ३.३५; पृ. १०२ )
जायफळ.

**सौमनसायिनी**-स्त्री., **वनस्पति० जातिपत्री** ( कच. ४.१६; रा. १२.६५; पृ. १०२) जायपत्री.

**सौमनस्य**-न., **मनसः प्रसन्नत्वम्** ( चसू. २५.४०; ( सुशा. १०.३० )
मनाची प्रसन्नता.

**सौमेरव**-न., **खनिज० सुवर्णम्** ( रा. १३.३; पृ. २०६ )
सोने.

**सौम्य**-वि., **सोमगुणप्रधानः** (चसू. ६.५) **सोमभूताधिदैवतस्वभावः** ( सुसू. १.२२ )
सोमगुणप्रधान. जलमहाभूताच्या अधिदैवताचा स्वभाव.
**जलभूयिष्ठम्** (सुशा. ३.३) जलाधिक्ययुक्त.
**कफजः** (चनि. १.४) कफज.
**ज्वरस्यैको भेदः, विधिभेदः, द्र० 'ज्वर'** ( चचि. ३.३२)
ज्वराचा एक प्रकार.
**पु., वनस्पति० उदुम्बरः** ( रा. ११.१३७; पृ. १८६ )
उंबर.
**गुण० शीतः** ( सुसू. १४.३ ) थंड.
**न., भैषज्य० दुग्धम्** ( ध. ६.१६१; पृ. २३९ )
दूध.

**( सौम्या )**-स्त्री., **वनस्पति० तद्गुणाः— मधुरा, कटुः शीता, पाचनी, यज्ञसाधनी, पित्तदाहनुत्, तृष्णाविशोषशमनी च** ( रापरि. ३.३१; पृ. ३३२ )
कांडे असलेली पाने नसलेली वेल. गुण— गोड, तिखट, थंड, पाचक, यज्ञसाधनी, पित्तदाहनाशक तहान व शोषशामक.
**रुद्रजटा** ( रापरि. ३.२४; पृ. ३३१ )
सुगंधी पानांची मोठ्या मुळया असलेली सुगंधी वेल.
**सठी** ( रा. ६.८७; पृ. १९) कचोरा.
**हेमा** ( रापरि. ३.१३; पृ. ३३० )

सोनेरी फुलांची सोनेरी वेल.
**मल्लिका** ( रा. १०.२२५; पृ. १९७ )
मोगरा, मोगरी.
**ब्राह्मी** ( रा. ५.१४७; पृ. १५४. ) ब्राह्मी.
**शालिपर्णी** ( ध. १.८७; पृ. २३.) सालवण.
**नागवल्ली** ( धपरि. ३.१; पृ. १३१ )
विड्याचे पान. विड्याच्या पानांची वेल.
**गुडूची** ( ध. १.३; पृ. ८१ ) गुळवेल.
**क्लीतनकम् यष्टिमधुभेदः द्र० ' यष्टिमधु '** ( रा. ६.१८५; पृ. ३४ )
ज्येष्ठमध प्रकार. पहा 'यष्टीमधु'.
**चूडामणिः, काकमाची-भेदः** ( रा. ३.४६; पृ. १४० )
कावळीचा प्रकार.
**इन्द्रवारुणी** ( रा. ३.३७६; पृ. ५८ )
कडु इंद्रावण, कवंडळ.
**तेजोवती** ( रा. ३.३९३; पृ. ६१ ) मालकांगोणी.
**भैषज्य० मौक्तिकम्** ( रा. १३.६६; पृ. २१८ )
मोती.

**-गन्धा**-स्त्री., **वनस्पति० शतपत्री** ( ध. ५.१५१; पृ. २०१ )
शेवंती.

**-धातु-शारीर० रसधातुः** ( सुचि. २६.१०-११; असंनि. ५.४४ )
रसधातु.
**शुक्रधातुः** ( सुचि. २६.१०-११ )
शुक्रधातु, वीर्य.

**-मर्मन्**-न., **सौम्येषु मर्मसु सोमोऽधिकः, वैकल्यकराणि सौम्यानि** ( सुशा. ६.१६ )
सौम्य मर्माच्या ठिकाणी सोम आधिक्याने असतो यामुळे प्राणधारण होते. येथे आघात झाल्यास प्राण जात नाही. व्यंगमात्र होते.

**सौम्यर्तु**-पु., **शीतकालः हेमन्तः** ( सुचि. ३.८ )
थंडीचे दिवस. हेमंत ऋतु.

**सौम्याख्यागद**-पु., **भेषज्य० मनःशिला, शमीपुष्पत्वक्सर्षपकपित्थगोपित्तादियुक्तः योगोऽयम् औषधिविषहरः** ( असंसू. ८.१०९-११ )
मनशीळ, शमीची फुले, दालचिनी मोहरी, कवठ, गाईचे पित्तयुक्त योग. हा योग विषहर आहे.

**सौम्याग्नेयमर्मन्**-न., **यत्र मर्मसु सोमाग्नी भूयसाऽवतिष्ठतः, अग्निगुणेष्वाशु क्षीणेषु क्रमेण च सोमगुणेषु कालान्तरेण क्षपयन्ति । यथा कालान्तरप्राणहराणि मर्माणि** ( सुशा. ६.१६ )
ज्या मर्माच्या ठिकाणी सोम आणि अग्नितत्वे आधिक्याने राहातात असे मर्म. अग्निगुण लवकर आणि सोम गुण हळु हळू क्षीण झाल्यास बऱ्याच काळाने प्राणहरण होते. प्राणहर मर्माप्रमाणेच हे आहे.

**सौर**-पु., **वनस्पति० तुम्बुरुः** ( ध. २.४२; पृ. ७८ )
रानकोथिंबीर.

**सौरभ**- पु., **वनस्पति० तुम्बुरुः** ( ध. २.४२ पृ. ७८ )
रानकोथिंबीर.
न., **वनस्पति० निर्यास० बोलम्** ( रा. ६.११६ पृ. १०८ )
बोळ.
**धान्य० व्रीहिः** ( रा. १६.११७ पृ. २२२ )
तांदळाचा एक वर्ग.

**सौरस**-पु., **रक्तजकृमिः** (चवि. ७.११) चसू १९.४(९)
एक रक्तज कृमि प्रकार.

**सौरस्य**-न., **सौगन्ध्यम्** ( असंशा. ९.१७ )
सुगंधत्व, सुगंधीपणा.

**सौराव**-पु., **मांसरसस्योपरितनोऽच्छो भागः, तस्य गुणाः-सर्वभूतानां प्रीणनो विशेषान्मुखशोषिणां हितः, क्षुत्तृष्णाऽपहरः, स्वादुः शीतलश्च** ( सुसू. ४६.३६२-३६३ )
मांसरसाच्या वरचा स्वच्छ भाग. गुण-सर्व प्राण्यांना आवडणारा. विशेषतः तोंडाला शोष पडणाऱ्यांना हितकर, भूक व तहान नाशक, गोड व थंड

**सौराष्ट्र**-पु., **वनस्पति० कुन्दुरुः** ( रा. १२.१९०; पृ. १२१ )
लोबान, ऊद.
पु., न., **देश० काठियावाडनामा** ( र. ३.६६ )
काठेवाड.

**( सौराष्ट्री )**-स्त्री., **खनिज० स्फटिका** ( चचि. ७.११४; सुउ. ६२.३१ ) **तद्गुणाः-कटुः, कषाया, केश्या, व्रणरोपणी, नेत्रहितकरी; कण्ठ्या** ( र. ३.७० ) **त्रिदोषघ्नी, विषकण्डूविसर्पश्वित्रनाशिनी** ( ध. ३.१०५; पृ. ११६ ) **उपदंशव्रणे लेपार्थमुपयुज्यते** ( असंउ. ३९ ) **तस्याः शोधनं**

सत्त्वपातनं च काञ्जिके क्षिप्ता सा दिनत्रयेण शुद्धा भवति । क्षाराम्लैर्मर्दिता ध्माता तुवरी स्वीयसारं मुञ्चति। सा गोपित्तेन वारशतं भावयेदनन्तरं ध्मापयेत् एवं साऽतिगोपनीयं क्रामणं सत्वं मुञ्चति ( र. ३.७१-७३ )
तुरटी. गुण–तिखट, तुरट, केसांना घशाला व डोळ्यांना हितकर, व्रणरोपक, त्रिदोषघ्न, विष, धावरे, खाज कोड नाशक. उपदंशाच्या व्रणावर लेपाकरिता उपयुक्त. शुद्धी-कांजीत तीन दिवस ठेवली की शुद्ध होते. अल्प क्षार–द्रव्यांबरोबर मर्दन करून मुशीत घालून अग्नीवर फुंकावे. किंवा गाईच्या पित्ताने शंभर वेळां भावना देऊन फुंकावे म्हणजे तिचे सत्त्व निघते. हे क्रामणा-करिता उपयुक्त कुणालाही न सांगण्यासारखे आ.हे
**वनस्पति० कुन्दुरुः** ( ध. ३.१३१; पृ. १२१ )
लोबान, ऊद.

**सौराष्ट्रिक**–वि., **सौराष्ट्रदेशविशेषस्थः** ( लोक० ) ( चवि. १.१८ )
काठेवाडी ( माणूस )
न., **खनिज० कांस्यम्** ( रा. १३.२४; पृ. २१० )
कांसे.

( **सौराष्ट्रिका** ) स्त्री., **खनिज० सौराष्ट्री, तुवरीमृत्तिका** ( चक्र. चचि. ३०.७८-८० ) तुरटी.

**सौरि**–पु., **वनस्पति० आदित्यभक्ता** (रा. ४.१४४; .पृ १५३ )
सूर्यभक्ता.
**असनः** ( ध. ५.१२५; पृ. १९५ ) असणा.

**सौरीयक**–न., **स्थावरविषभेदः, यस्य त्वक्सारो निर्यासश्च विषमयो भवति** ( सुक. २.५ )
एक वनस्पति विष. याची साल, नार व डिंक विषारी आहे.

**सौर्यमारुतिक**–वि., **वातातपिको ( विधिः ) असौ सूर्यमारुतसेवयाऽपि क्रियते इति** (चचि. १(४)२८)
वातातपिक विधि. वात व ऊन ही वर्ज न करताही रसायन सेवन करावयाचा विधि.

**सौवर्चल**–न., **खनिज० पञ्चलवणेष्वेकम्** (चसू. २७.३०१) **तद्गुणाः–लवणं; कटु** ( सु ) **उष्णं, लघु, सूक्ष्मं, रुच्यं, सुगन्धि, हृद्यम्; विशदम्** ( सु ) **उद्गारशोधि; गुल्मशूलविबन्धघ्नं च** ( सुसू. ४६.३१७; चसू. १.८८.८९ ) **ऊर्ध्ववातामार्तिनाशनम्** ( ध. २.३०; पृ. ७४ )
हिं.—संचरनमक.
**म.—पादेलोण.**
गु.—संचललूण.
बं.—संचरलवण.
पाच मिठांपैकी एक. काळे मीठ, पादेलोण. गुण—खारट, उष्ण, हलके, सूक्ष्म, रुचकर, सुगंधी, हृदयाला हितकर, चिकटा स्वच्छ करणारे, ढेकर शुद्ध करणारे; अवरोध नाशक, गुल्म, शूल, ऊर्ध्ववात, आम, वेदना नाशक, आमरोग नाशक.
**वनस्पति० सूर्यावर्तशाकम्** ( चक्र. चचि. २९.५२ )
एक भाजी. आदित्य भक्ता.

**सौवर्ण**–वि., **सुवर्णस्येदम्** ( सुउ. १८.६१-६२ ) **स्वर्णस्य कृतमतिसूक्ष्मं चूर्णम्** ( सुशा. १०.६८ ७० )
सुवर्णाचे. सोन्याचे अतिसूक्ष्म चूर्ण.
**सुवर्णभस्म** ( भाप्र. सुशा. १०.६८.७० )
सुवर्ण भस्म.

( **सौवर्णी** )–स्त्री., **वनस्पति० दारुहरिद्रा** (चचि.७.७७)
दारुहळद.

**सौवर्णिका**–स्त्री., **लूता० तद्दष्टलक्षणानि–ध्यामः सफेनो मत्स्यगन्धकः श्वासः कासो ज्वरस्तृष्णा सुदारुणा मूर्च्छा चात्र भवन्ति। चिकित्साऽसाध्या, कृच्छ्रसाध्या च** ( सुक. ८.१२२ )
लूताप्रकारातील एक विषारी किडा. डसल्याची लक्षणे–काळा फेसयुक्त माशाच्या वासासारखा वास असलेला व्रण. श्वास, खोकला, ज्वर, तहान, अतिशय त्रासदायक मूर्च्छा. कष्टाने साध्य.

**सौवीरक**–न., **आसुत०** ( सु सू. ४४.३५-४० )
कांजीचा एक प्रकार.

**सौवीर**–न., **वनस्पति० बदरभेदः, सौवीरबदरम्** (अहसू. ६.१२०; ध. ५.९६ पृ.) **द्र० 'बदर'**
बोराचा एक प्रकार.
**अञ्जनविशेषः, सुवीरानदीभवमञ्जनम् अक्ष्णोर्नित्यं हितं प्रयोजयेत्** ( च. सू. ५.१५ ) **पित्तविदग्धदृष्टौ हितम्** ( सुउ. १७.१३.१४ ) **तच्च हिमं रक्तपिहरं विषहिध्मादिरोगघ्नं, व्रणशोधनरोपणंच** ( ध. ३.९५१; र. ३१९ पृ. १२५ )
हिं.—सफेद सुरमा.
**म.—पांढरा सुरमा.**
गु.—सुरमो.
बं.—श्वेतसुरमा.
बं.—श्वेतसुरमा

पांढरा सुरमा. सुवीरा नदीत सापडणारा उपधातु. डोळ्यांना नेहमी वापरल्याने हिताचा. पित्ताने बिघडलेल्या दृष्टीलाही हितकर. तो थंड, रक्तपित्त नाशक; विष, उचकी इत्यादी रोग नाशक; व्रणाची शुद्धि करणारा व रोपक.

**आसुत० काञ्जिकम्** ( ध. ६.२४९; पृ. २५० )
कांजी.

**–बदर**–न., **बदरफलम्; तच्च पुरातनं ग्राह्यम्, तद्गुणाः–तृट्शमनं, श्रमघ्नं, दीपनं, लघु, स्निग्धं, मधुरं वातपित्तजिच्च** ( सुसू. ४६.१४६ )
बोराचा प्रकार. हे जुने घ्यावे. **गुण**–तहान शामक, थकवा नाशक, दीपक, हलके, स्निग्ध, गोड. वातपित्तनाशक.

**–सार**–न., **खनिज० स्रोतोञ्जनम्** ( रा. १३.२२६; पृ. १२७ ) सुरम्याचा एक प्रकार, पांढरा सुरमा.

**सौवीरक**–पु., **देश०** ( चवि. १.१८ )
एक देश. सिंधु व झेलम या मधील देश.

**न., आसुत० काञ्जिकम्** ( चसू. १५.७ ) ( सुउ. १७.१३-१४; ध. ६. २५१; पृ. २५१ )
कांजी.

**सौवीरकाञ्जन**–न., **अञ्जन० सौवीरम्** ( असंसू. १२.२५-२६ )
पांढरा सुरमा.

**सौवीराञ्जन**–न., **अञ्जन० सौवीरम्** ( र. ३.१०८ )
पांढरा सुरमा.

**सौवीरोदक**–न., **आसुत० तद्गुणाः– दीपनं, जरणीय, ग्रहण्यर्शोहितं भेदि हृत्पाण्डुकृमिरोगनुच्च** ( चसू. २७.१९१ )
कांजीचा प्रकार. **गुण**– दीपक, पाचक, ग्रहणी, मूळव्याध, यात हितकर, मळ फोडणारे; हृदय-रोग, पांडु, कृमि नाशक.

**सौशृताख्य**–पु., **नारिकेलपाकः** ( र. २६.५६-६२ )
नारळाचा पाक.

**सौश्रुत**–न., **सुश्रुतप्रोक्तं तन्त्रम्, सुश्रुतसंहिता** ( सुसू. ४.९ )
सुश्रुताने सांगितलेले शास्त्र. सुश्रुतसंहिता.

**सौषिर्य**–वि., **सुषिरत्वम्** ( अरु. ) **सरन्ध्रत्वम्** ( हे. अहसू. १२.५० )
पोकळपणा. सच्छिद्रत्व. सच्छिद्रता.

**सौसुराद्**–पु., **पुरीषजक्रिमिविशेषः** ( चवि. ७.१३ )
मळातला एक कृमि प्रकार.

**सौहित्य**–न., **तृप्तिः** ( चसू. ५.६; सुउ. ४२.९ ) **वैपुल्यम्** ( चनि. ३.१५; चवि. २.८ )
तृप्ति, पोटभर, विपुलता.

**सौहित्यासहता**–स्त्री., **तृप्त्यक्षमत्वम्** ( सुउ. ४२.९ )
तृप्ति होईल इतके खाल्लेले सहन न होणे.

**स्कन्द**–पु., **पुरुषशरीरग्रहविशेषः** ( असंउ. ३ ) **बालग्रहः कार्तिकेयः स्कन्दग्रहः** ( कासू. १९ )
एक बालग्रह, कार्तिकेय.

**प्राचीनो रसाचार्यः** ( र. २२.२९ )
प्राचीन रसशास्त्रवेत्ता.

**–ग्रह**–पु., **बालग्रह० नवग्रहेष्वेकः** ( सुउ. २७ ४.५ ) **स्कन्दजुष्ट-लक्षणानि– बालस्याक्षिणी शोफयुक्ते भवतः । स विस्रगन्धी स्तनानभिलाषी वक्रमुखः संभ्रमितचित्तो मिलितलोचनोऽल्परोदनो गाढमुष्टि-वर्चा हतचलितपक्ष्मनेत्रः यः, सः स्कन्दग्रहार्तो बालः** ( सुउ. २७.८; काइ. ११.१४ ) **तत्र वातहरा चिकित्सा कार्या** ( सुउ. २८.३ )
एक बालग्रह. नवग्रहांपैकी एक. लक्षणे–बालकाच्या डोळ्यांना सूज, अंगाला घाण, स्तनपानाचा तिटकारा तोंड वाकडे होते, भ्रमिष्ट चित्त, डोळे मिटलेले, रडणे कमी, मुठी घट्ट आवळणे, मळ घट्ट होणे, एक पापणी उघडझाप करते व एक करीत नाही. उपचार–वातहर.

**–ग्रहप्रतिषेध**–पु., **अध्यायसंज्ञा०** ( सुउ. २८.१ )
अध्यायाचे नाव. यात बालग्रहाचे उपचार आहेत.

**–पितृ**–पु., **बालग्रह० महादेवः** ( काइ. १५.१६ )
बालग्रह. महादेव.

**–भगिनी**–स्त्री., **स्त्रीग्रह० स्कन्दग्रहस्य भगिनी रेवती, षण्मुखी, षष्ठी** ( का बालग्रहचि. )
बालग्रह. स्कंदाची बहीण रेवती.

**स्कन्दन**–न., **शोणितस्य स्त्यानीकरणम्, रक्तस्तम्भनोपायेष्वेकः** ( सुसू. १४.३९ )
रक्त गोठविणे. रक्त थांबविण्याचा एक उपाय.

**स्कन्दापस्मार**–पु., **ग्रह० बालग्रहरोगः** ( काइ. १४.१५ ) **तज्जुष्टलक्षणानि–ग्रहग्रस्तशिशुः कदाचित् संज्ञां प्राप्नोति। कदाचिदसंज्ञां प्राप्नोति। कम्पितवपुः करचरणौ नर्तयतीव शब्दं कुर्वन् मूत्रवर्चसी त्यजति, सजृम्भः फेनं विसृजति। स्कन्दस्य सखा मित्रं, तेन जुष्टस्तत्सखाभिपन्नः**

(सुउ. २७.९) **तल्लक्षणानि–संज्ञानाशः, केशलुञ्चनं, कन्धरानतिर्विनम्य, जृम्भणं, शकृन्मूत्रप्रवर्तनं, फेनोद्वमनमूर्ध्वेक्षा, हस्तभ्रूपादनर्तनं, स्तनस्वजिह्वा-संदंशः, संरभो ज्वरो जागरः, पूयशोणितगन्धः** (असंउ. ३)
बालकाला स्कंदग्रहाने पछाडल्यामुळे होणारा अपस्मार. लक्षणे- मधून मधून बेशुद्धि, कंप, हातपाय नाचल्यासारखे, अपान वायु शब्द करीत लघ्वी व शौच होते, जांभई, फेस येतो. स्कंदाचा मित्र जो अपस्मार तो पछाडतो तेव्हा लक्षणे— संज्ञा नष्ट होते, केस ओढतो, मान वाकते, जांभई, मळमूत्र–प्रवृत्ति होताना वाकतो, फेस ओकतो, वर पाहतो, हात पाय भुवया नाचांतल्या हावभावाप्रमाणे हालतात. स्तन व आपली जीभ चावतो, हातपाय आपटतो, ज्वर, जागरण, पू व रक्त यांच्या सारखी घाण.

**स्कन्दापस्मारप्रतिषेध**–पु., **अध्यायसंज्ञा०** (सुउ. २९.१)
अध्यायाचे नाव. यात स्कंदग्रहजन्य अपस्माराचे उपचार आहेत.

**स्कन्दार्त**–वि., **स्कन्दग्रहपीडितः** (असंउ. ३)
स्कंदग्रहाने पीडलेला.

**स्कन्दिन्**–वि., **घनीभूतम्** (अहृसू. २७.४०)
घनीभूत, घट्ट, घट्ट झालेले.

**स्कन्ध**–पु., **शारीर० बाहुशिरः, बाहोरुपरितनो भागः** (चवि. ८.१०७; सुसू. ४६.१३१)
बाहूचे डोके, वरचे टोक, खांदा.
**तरोर्मूलादिशाखापर्यन्तभागः** (असंचि. २४)
झाडाच्यामुळा पासून शाखेपर्यंतचा भाग. झाडाचे खोड.
**खनिज० पारदः** (रा. १३.४३; पृ. २१४)
पारा.

**–घात**–पु.; **स्कन्धस्य मुष्ट्यादिना हननम् आघातो वा** (अहृसू. २८.३९)
खांद्यावर मुठ इत्यादींनी मारणे, ठोकणे, आघात करणे.

**–ज**–पु., **वनस्पति० वटः** (ध. ५.७६; पृ. १८४)
वड.

**–तरु**–पु., **वनस्पति० नारिकेलः** (रा. ११.१०५; पृ. १८३)
नारळ.

**–रुह्**–पु., **वनस्पति० वटः** (रा. ११.११३; पृ. १८४)
वड.

**–रोग**–पु., **स्कन्धस्य रोगः** (चसि. २.२२)
खांद्याचा रोग. हाताच्या वरच्या टोकाचा रोग.

**स्कन्धांशक**–पु., **खनिज० पारदः** (रा. १३.४३ पृ. २१४) पारा.

**स्कन्धाश्रित**–वि., **स्कन्धः कोष्ठः तदाश्रितम्, (अन्तराधिः)** (चसि. ९.३)
स्कंध म्हणजे कोठा, त्यावर आश्रित असलेली (मर्मे) आतला कोठा, पोट.

**स्कन्नत्व**–न., **घनीभूतत्वम्** (अहृसू. १२.२८)
घन झालेला. घट्ट.

**स्खलित**–न., **लुठनम् (पादादेः)** (सुसू. २९.४५)
ढळलेले, सरकलेले. पाय इ०

**स्तन**–पु., **शारीर० पयोधरः, षट्पञ्चाशत्प्रत्यङ्गेष्वेकम्, द्वौ स्तनौ** (चशा. ७.११) **पुंसस्तथा नार्याः स्तनाविल्ययमुभयोर्विशेषः; नार्याः स्तनौ यौवनागमने पीवरौ भवतः। तावेव प्रसूताया गर्भवत्याः क्षीरपूरितौ भवतः** (सुशा. ५.४) **बहिर्मुखस्रोतोविशेषः** (सुशा. ५.१०) **इयं स्तनसंपत्— नात्यूर्ध्वौ, नातिलम्बावनतिकृशावनतिपीनौ युक्तपिप्पलकौ सुखप्रपानौ स्तनौ** (चशा. ८.५३)
स्तन, थाना. छप्पन्न प्रत्यंगांपैकी एक. दोन स्तन. पुरुष व स्त्री दोहोच्या स्तनातील फरक– यौवनात स्त्रीचे स्तन पुष्ट व मोठे होतात. (पुरुषाचे होत नाहीत) गर्भिणी व बाळंतिणीचे दुधाने पूर्ण होतात. बाहेर तोंड असलेले एक स्रोतस. स्तनाचे उत्तम गुण–अतिशय वर, अतिलांब, अति लोंबलेले, अति लहान, अति मोठे नसावे; योग्य बोंडी असलेले व बालकाला सुखाने दूध पिता येण्यासारखे असावे.

**–कीलक**–पु., **स्तनरोग० शोथशूल–रुजा–दाहसहितः स्पर्शासहः स्तनः** (कासू. १९) **तच्चिकित्सा–घृतपानं मर्दनं शीताः सेकाः प्रलेपाश्च शस्यंते** (कासू. १९)
स्तनाचा रोग. लक्षणे–सूज, शूल, वेदना, दाह, स्पर्श सहन न होणे. उपचार–तूप पिणे, मर्दन, थंड द्रव्याचे सिंचन व लेपयुक्त.

**–द्वेष**–पु., **लक्षण० स्तनपानस्य द्वेषः** (कासू. २५.८)
अंगावरचे दूध पिण्याचा तिटकारा.

**-पर्यन्त**-न., शरीरप्रत्यङ्ग० **स्तनान्तयोर्मध्यम्** ( चवि. ८.११७ )
दोन्ही स्तनांमधील भाग.

**-मण्डल**-न., शारीर० **स्तनः** ( चनि. ३.१४ ) स्तन.

**-मूल**-न., मर्म० **स्तनमूलमर्म** ( असंशा. ७.१२ )
स्तनाच्या मुळाशी असलेले मर्मस्थान.

**-मूल-( मर्मन् )** न., **स्तनयोरधस्ताद्‌द्व्यङ्गुलद्वयमुभयतः स्तनमूले नाम मर्मणी, तत्र कफपूर्णकोष्ठतया कासश्वासाभ्यां म्रियते** ( सुशा ६.२५ ) **वक्षोमर्म** ( सुशा. ६.१० ) **स्तनाधस्तात् द्व्यङ्गुलप्रदेशे-स्तनमूलमर्म** ( ड. सुशा ६.२५ ) **सिरामर्म** ( सुशा. ६.७ ) **कालान्तरप्राणहरमर्म** ( सुशा. ६.१०.११ ) **मर्मसंख्या वामदक्षिणभेदेन द्वे; स्तनमूलमर्मणी ) द्व्यङ्गुलम्** ( सुशा. ६.२८ ) **स्तनमूलाख्यं मर्मद्वयं सिरामर्मणी द्व्यङ्गुले कालान्तर प्राणहरे च** ( सुशा. ६. २५ )
स्तनमूल-एकमर्म. स्तनाच्या खाली दोन अंगुळावर स्तनमूळ मर्म आहे. तेथे आघात झाल्यास खोकला व श्वास यांनी व कफपूर्ण कोठा होऊन मरतो. उरोमर्म, शिरामर्म, कालांतराने-सात दिवसानंतर मरण आणणारे दोन्ही स्तनां खाली एकेक. डावे, उजवे अशी दोन मर्मे. प्रमाण दोन अंगुळे.

**-रोग**-पु., **रोग० स्त्रीणां स्तनाश्रितव्याधिः** ( सुनि. १०.१५ ) **चतुःषष्टिसूतिकारोगेष्वेकः, स्तनविद्रधिः** ( सुनि. १०.२६ )
स्तनरोग. स्तनाचा रोग, बाळंतिणीच्या ६४ रोगांतील एक. स्तन विद्रधी.

**-रोगनिदान**-न., अध्यायसंज्ञा० ( सुनि. १०.१ )
अध्यायाचे नाव. या अध्यायात स्तनाच्या रोगांची माहिती आहे.

**-रोहित**-न., मर्म० **स्तनरोहितमर्म०** (सुशा. ७.१३) **स्तनचूचुकयोरूर्ध्वं द्व्यङ्गुलमुभयतः स्तनरोहितौ नाम, तत्र लोहितपूर्णकोष्ठतया कासश्वासाभ्यां च म्रियते** ( सुशा. ६.२५ ) **वक्षोमर्म** ( सुशा. ६.६-१०,२५ ) **स्तनचूचुकयोरूर्ध्वम्** ( सुशा. ६.२५ ) **मांसमर्म** (सुशा. ६.७ ) **कालान्तरप्राणहरमर्म** ( सुशा. ६.१०-११ ) **मर्मसंख्या वामदक्षिणभेदेन द्वे, स्तनरोहितमर्ममानं द्व्यङ्गुलम्** ( सुशा. ६.६ )
एक मर्म. स्तनाच्या बोंडीच्या वर दोन अंगुळांवर, आघाताने रक्तपूर्ण कोठा व खोकला आणि श्वास यांनी मरण. उरोमर्म. मांस मर्म. कालांतराने सात दिवसांनंतर मरण. डावे व उजवे अशी दोन मर्मे.

**-विद्रधि**-पु., **स्तनरोग० सूतानां गर्भिणीनां वा योषितां विवृताः स्तनशिराः प्राप्य दोषाः सदुग्धे अदुग्धे वा स्तने बाह्यविद्रधिलक्षणं घनं श्वयथुं कुर्वन्ति । नाडीनां सूक्ष्मत्वात्कन्यानामेष विद्रधिर्न जायते** ( असंनि. १२.२०-२१ )
स्तनाचा विद्रधि. गर्भिणी किंवा बाळंतिणीच्या स्तनांतील विस्तृत झालेल्या शिरांमध्ये दोष दुष्ट होऊन दूध असलेल्या किंवा नसलेल्या स्तनात बाहेरच्या विद्रधीची लक्षणांनी युक्त घट्ट सूज उत्पन्न करतात. कुमारिकांमध्ये नाड्या सूक्ष्म असल्यामुळे त्यांना विद्रधि होत नाही.

**-संपद्**-स्त्री., **सुष्ठु स्तनः, स्तनसौष्ठवम्** ( चशा. ८.५३ )
उत्तम गुणवान घटक, उत्तम गुण समृद्धि, उत्तम गुणवान घटक घटित स्तन, स्तनसंपत्ति, स्तनांचे सौंदर्य.

**-स्तम्भ**-पु., **लक्षण० स्तनयोः स्तब्धता** ( काखिल. ११.६४ )
स्तन जखडल्या-ताठरल्यासारखे-दडस वाटणे.

**स्तनन**-न., **ध्वनिः** ( चचि. १८.१२ )
ध्वनि, आवाज.

**स्तनन्धय**-वि., **स्तनौ धयति पिबति इति स्तन्यपाय्यावस्थात्मकः ( बालः )** ( र. १३.८२-९२ )
जो स्तन पितो तो. स्तनपान करण्याच्या अवस्थेतला.

**स्तनयित्नु**-पु., **मेघः** ( सुसू. ५.२५ )
मेघ, ढग.

**-घोष**-पु., **मेघगर्जितम्** ( सुसू. २.९ )
मेघाची गर्जना.

**स्तनान्त**-पु., **स्तनाग्रम्, चूचुकम्** ( चसि. २.१६ )
स्तनाचे टोक, बोंडी, स्तनाचे अग्र.

**स्तनान्तर**-न., शारीर० **स्तनयोर्मध्यम्** ( चवि. ८.११७; सुसू. ३५.४ )
दोन्ही स्तनांमधील भाग.

**स्तनान्तशूल**-पु., **लक्षण० स्तनान्तर्भागस्य शूलः** ( चसि. २.१६ )
स्तनाच्या आतल्या भागातील शूल.

**स्तनान्तशोष**–पु., लक्षण० स्तनान्तर्भागस्य शोषः (चसि. २.१६)

स्तनाच्या आतल्या भागाचा शोष. सुकणे.

**स्तनान्तस्तम्भ**–पु., लक्षण० स्तनाग्रस्य स्तम्भः (चसि. २.१६)

स्तनाग्राची– स्तनाची बोंडी दडस– ताठर होणे.

**स्तनितफल**–पु., वनस्पति० विकण्टकः (रापरि. ११.२०; पृ. ३७४)

धमासा.

**स्तनोत्थितरोग**–पु., रोग० स्तनविद्रधिः (सुचि. १७.४५-४७)

स्तनाला होणारा रोग.

**स्तन्य**–न., दुग्धम्, स्त्रीदुग्धम्, स्तनेभवं स्तन्यम्, रसधातोरुपधातुः, रसात् स्तन्यम् (चचि. १५.१७) कृत्स्नदेहात् स्तनौ प्राप्तः पक्वाहारनिमित्तजो मधुरो रसप्रसादः स्तन्यमित्यभिधीयते (सुनि. १०.१८) **तल्लक्षणानि** पाण्डुरं मधुरमविवर्णं निर्दोषमुदके क्षिप्तमेकीभवति (सुनि. १०.२५) शीतं स्निग्धम् (चसू. १.१०७) **उत्पत्तिः** स्त्रीणां प्रसूतितस्तृतीये चतुर्थे वाह्नि हृदयस्थानां सिराणां विवृतत्वात् स्तन्यं प्रवर्तते (सुशा. १०.१४; असंउ. १) **प्रस्रवणहेतुः** तत्र मौलिको हेतुः स्नेहः, सहायकहेतवः– अपत्यस्य स्पर्शनं, दर्शनं, स्मरणं, स्तनपानार्थं ग्रहणम् (सुनि. १०.२२-२३) **कार्यम्** स्तनयोरापीनत्वजननम्, बालानां पोषणञ्च (सुसू. १५.५) **स्तन्यदुष्टिः**–लवणाम्लकटुक्षारसेवनमनःशरीरसंतापादिहेतुभिर्दोषाः क्षीरवहाः सिराः प्राप्य स्तन्यं दूषयन्ति (चचि. ३०.२३२-३६) सा दोषभेदेन त्रिविधा; तत्र **वातदुष्टिः**–श्यावारुणवर्णं कषायानुरसं विशदमनालक्ष्यगन्धं रूक्षं द्रवं फेनिलं लघ्वतृप्तिकरं कर्शनं वातविकाराणां कारकं वातोपसृष्टं क्षीरमभिज्ञेयम् (चशा. ८.५५) **वातसंसृष्टक्षीरलक्षणम्**– वैरस्ययुक्तम्, कार्श्यकरं कृच्छ्रेण देहवृद्धिकरं क्षामस्वरत्वजनकं, बद्धविण्मूत्रमारुतत्ववातिकशीर्षरोगपीनसादिकरं, बलह्रासकरं च (चचि. ३०.२३९) **पित्तदुष्टिः**–कृष्णनीलपीतताम्रावभासं, तिक्ताम्लकटुकानुरसं कुणपरुधिरगन्धिभृशोष्णं पित्तविकाराणां कर्तृ च पित्तोपसृष्टं क्षीरमभिज्ञेयम् (चशा. ८.५५) **पित्तसंसृष्टक्षीरलक्षणम्** नीलपीतासितादिकं स्तन्यवैवर्ण्यं च, तादृशस्तन्यसेवनात्, शिशुर्विवर्णगात्रः स्विन्नस्तृष्णालुर्भिन्नविड्उष्णशरीरः स्तनपानद्विट् च भवति। प्रकुपितपित्तसंसर्गात् क्षीरं दुर्गन्धि जायते। तत्पानात् पाण्ड्वामयः कामला च जायते (चचि. ३०.२४३, ४४) **कफदुष्टिः**– अत्यर्थशुक्लमतिमाधुर्योपपन्नं लवणानुरसं घृततैलवसामज्जागन्धि पिच्छिलं तन्तुमदुदकपात्रेऽवसीदच्छ्लेष्मविकाराणां कर्तृ श्लेष्मोपसृष्टं क्षीरमभिज्ञेयम् (चशा. ८.५५) **कफसंसृष्टक्षीरलक्षणम्**– क्षीरमतिस्निग्धं भवति। तत्सेवनात् शिशुश्छर्दनः कुन्थनो लालालुर्निद्राक्लमसमन्वितः श्वासकासप्रसेकतमकान्वितः शूनवक्त्राक्षो जडश्च भवति। कुपितात् कफसंसर्गात् क्षीरं गुरुतरं भवति। तत्पानाच्च शिशोर्हृद्रोगपीडा जायते तथा क्षीराश्रिता अन्याश्च रोगा जायन्ते (चचि. ३०.२४६-४९) **सामान्यचिकित्सा**–स्तन्यशुध्यर्थमादौ स्नेहोपपादितां धात्रीं संस्वेद्य वमनेनोपपादयेत्। सम्यग्वान्तां कृतसंसर्जनां तां स्नेहयित्वा विरेचयेत्। ततो दोषावशेषघ्नैरन्नपानैरुपाचरेत् (चचि. ३०.२५१-–५६) लवणानुरसं स्तन्यं विसर्पकोठकण्डूकरम्, तन्तुमत् स्तन्यं दौर्बल्यश्वासकासकरम् (असंउ २) **स्तन्यपानापथ्यम्**– क्षुधितशोकार्तश्रान्तप्रदुष्टधातुगर्भिणीज्वरिताऽतिक्षीणाऽतिस्थूलविदग्धभक्तविरुद्धाहारतर्पितायाः स्तन्यं न पाययेत् (सुशा. १०.३१) **स्तन्याभावे** पयश्छागं गव्यं वा तद्गुणं पिबेत् (असंउ. १) **स्तन्यक्षयलक्षणानि**–स्तनयोर्म्लानता, स्तन्यासंभवः स्तन्याल्पता वा (सुसू. १५.१२) स्तन्यक्षयवती सुराशाल्यन्नमांसानि, गोक्षीरं, शर्करां दध्यासवं वाञ्छति (ड. सुसू. १५.२९-३१) क्रोधशोकावात्सल्यादिभिश्च स्तन्यनाशो भवति (सुशा. १०.३०)

अंगावरचे दूध, मानवी दूध, स्तनापासून होणारे ते स्तन्य. रसधातूचा उपधातु, पचलेल्या आहारापासून उत्पन्न झालेल्या रसाचा (धातूचा) प्रसाद–मधुर असा जो सारभूत भाग तो स्तन्य–दूध. **लक्षण**— पांढरे, गोड, निर्दोष, वर्ण चांगला असलेले, पाण्यात टाकल्यावर एकरूप होणारे, थंड स्निग्ध. **दुग्धोत्पत्तीचा दिवस**—प्रसूतीनंतर तिसऱ्या, चौथ्या दिवशी हृदयातील शिरा विस्तृत होत असल्याने दूध येते. **दूध स्रवण्याचे महत्वाचे कारण प्रेम**

**म्हणजे वात्सल्य होय. सहाय्यक हेतु**— मुलाचा स्पर्श, त्याचे स्मरण, तो दिसणे व स्तनपानाकरिता त्याला घेणे. **दुधाचे कार्य**—स्तनाची पुष्टि व मुलाचे पोषण. **दुधाची दुष्टि**—खारट आंबट तिखट क्षार यांचे सेवन, मनाचा संताप इत्यादी कारणांनी दुष्ट झालेले दोष दूधवाही शिरांत जाऊन दूध दुष्ट करतात. **दुष्टीचा प्रकार**—१ वात दुष्टि—काळसर लालसर रंग तुरट चव मागाहून लागणे, वास घेतला तर वाईट वास नाही तर नाही (दूध पुढे येताच आपोआप वाईट वास येणार नाही इतका कमी) बुळबुळीतपणा किंचितही नसलेले, रूक्ष, पातळ, फेसाळ, हलके, तृप्ति न करणारे, कृश करणारे, कष्टाने शरिराची वाढ करणारे, स्पष्ट रस न कळणारे, स्वर दुबळा करणारे, वात व मलमूत्रांचा अवरोध वातिक, डोकेदुखी, पडसे, शक्तीचा ऱ्हास करणारे. **पित्तदुष्टदूध**— काळा, निळा, पिवळा, तांबडा या रंगाची छटा भासणारे; कडु, आंबट, तिखट रस मागाहून जाणवणारे; रक्त किंवा प्रेत यांच्या प्रमाणे दुर्गंध असणारे, अति उष्ण पित्तविकार करणारे; वर्ण बिघडविणारे; घाम, तहान, मळ फुटीर, शरीर उष्ण, स्तनपानाचा तिटकारा, पांडुरोग, कावीळ करणारे. **कफदुष्टदूध**—अति पांढरे, अति गोड, अति स्निग्ध, अधिक जड, मागाहून थोडे खारट लागणारे, तूप—तेल—वसा—मज्जा यांचा वास येणारे बुळबुळीत तार असलेले, पाण्यात टाकले तर तळाशी जाते व कफाचे रोग करते ते दूध कफदुष्ट समजावे. तसेच त्याच्या सेवनाने बालक ओकते, कुंथते, लाळ गाळते, झोप, झापड श्वास, खोकला, तोंडाला पाणी, तोंडावर व डोळ्यावर सूज येते, ते जड स्थिर होते. हृद्रोग व शूल होतो. मागाहून खारट लागणारे दूध, धावरे चकंदळी व खाज करते, तार येणारे दूध दुबळेपणा, श्वास, खोकला करते. **सामान्य उपचार**— दूध शुद्ध करण्याकरता मातेला योग्य स्नेहन देऊन शेक देऊन वांती करवावी. योग्य वांत्या झाल्यावर कट इत्यादी देऊन नेहमीच्या अन्नावर आणून पुन्हा स्नेहन देऊन रेचक द्यावे. योग्य प्रमाणात रेच झाल्यावर शिल्लक दोष नाशाकरिता दोषनाशक अन्नपान द्यावे. **कोणते दूध अपथ्यकर**— भुकेली, शोकार्त, थकलेली, धातु दुष्ट झालेली, गर्भिणी, ज्वर असलेली, अतिक्षीण, अतिस्थूल, अन्नाची जळजळ होणारी, विरुद्ध आहार घेणारी यांचे दूध पाजू नये. अंगावरच्या दुधाच्या अभावी— शेळीचे किंवा गाईचे दूध आईच्या दुधाच्या गुणांचे करून द्यावे. दुधाच्या क्षयाची लक्षणे व कारणे— स्तन म्लान होणे, दूध थोडे किंवा मुळीच न येणे; क्रोध, शोक, मुलाबद्दल ममता न वाटणे इत्यादी कारणानी दुधाचा क्षय होतो. दारू, भात, मांस, गाईचे दूध, साखर, दही, आसव, घेण्याची जरुरी आहे. हे पदार्थ घेण्याची इच्छाही तिला होते, म्हणून ते तिला द्यावे.

**वनस्पति० शुक्लजीरकः द्र० ' जीरक '** ( ध. २.६८ )

पांढरे जिरे.

**—कर**—वि., **स्तन्योत्पादकम्** ( अहृसू. ५.२२ )

दूध उत्पन्न करणारे.

**—क्षय**—पु., **रोग० स्तन्यहीनता, द्र० ' स्तन '** ( सुसू. १५.१२ )

अंगावरील दुधाचा क्षय. दूध अपुरे येणे.

**—जनन**—वि., **द्रव्यगण० स्तन्योत्पादकः चतुष्के महाकषायेष्वेको गणः, वीरणशालिषष्टिकेक्षुवालिकादर्भकुशकाशगुन्द्रोत्कटकतृणमूलानीति दशेमानि स्तन्यजननानि भवन्ति** ( चसू. ४.१२ )

स्तन्य निर्माण करणारा एक गण. महाकषायांपैकी एक गण.वायवर्णा, साळ,साठे तांदूळ, तालीमखाना, दर्भ, कुश, कास, नागरमोथा, लाल ऊस व तृण मूळ.

**—दुष्टि**—स्त्री., **रोग० द्र० ' स्तन्य '** ( चचि. ३०.२५१—६२ )

दुधाची दुष्टि.

**—दोष**—पु., **रोग० द्र० ' स्तन्य '** ( अहृसू. १८.३ )

दुधातील दोष.

**—नाश**—पु., **रोग० स्त्रीदुग्धप्रवृत्तिनाशः द्र० 'स्तन्य'** ( सुशा. १०.३० )

दुधाचा नाश. दूध न येणे, दूध उडणे.

**—पर्याप्ति**—स्त्री., **स्तन्यस्य पर्याप्तिः परि समन्ततो भावेन प्राप्तिः। यावत् स्तनपानस्य योग्यता** ( ड. सुशा. १०.४८ )

स्तनाची गरज. जो पर्यंत स्तन्य पान करण्याची बालकाची योग्यता आहे, तो पर्यंत त्याला ते देणे. तसे नसेल तर अन्य मार्गाने ( इतर दूध देऊन ) ती गरज भागवणे.

**-प्रवर्तन**–न., **स्तन्योत्पादनम्** ( सुशा. १०.१४ )
स्तन्याचे उत्पादन, दूध येणे.

**-मातृ**–स्त्री., **धात्री** ( इन्दु. असंउ. ५ )
दुधाची आई, दायी.

**-वहसिरा**–स्त्री., शारीर० **स्तन्यवाही स्रोतोभेदः** ( कासू. १९ )
दूध वाहणारी शीर. स्तन्यवाही स्रोतसाचा प्रकार.

**-विनिवर्तन**–न., रोग० **स्तन्यनाशः** ( काचि. ११ )
स्तन्यनाश, दूध उडणे, दूध न येणे.

**-विशोधन**–न., **स्तन्यगतदोषाणां निर्हरणम्** ( चचि. ३०.२२९ )
दुधातील दोष काढणे, दूध शुद्ध करणे.
वि., **स्तन्यदुष्टिहरः** ( अहृसू. १०.१६ )
स्तन्याची दुष्टि नाशक.

**-शुद्धि**–स्त्री., **स्तन्यगतदोषाणां शोधनम्** ( चचि. ३०.२५१-५२ )
दुधाची शुद्धि करणे. दुधातील दोष काढणे.

**-शुद्धिकरवर्ग**–पु., द्रव्यगण० **पाठानागरसुरतरुघनाऽमृतासारिवेन्द्रयवमूर्वाः कटुकाकिराततिक्ताः, अयं वर्गः स्तन्यशुद्धिकरः** (असंसू. १५.२३)
स्तन्य शुद्धि करणाऱ्या द्रव्यांचा वर्ग— पहाडमूळ, सुंठ, देवदार, नागरमोथा, गुळवेल, अनंतमूळ, इंद्रजव, मोरवेल, कुटकी, काडेचिराईत.

**-शोधन**–वि., **स्त्रीक्षीरप्रसादनः** ( ड. सुसू. ३८.५४-५५ )
स्त्रीच्या दुधातील दोषाची शुद्धि.
**द्रव्यगण० दुष्टस्तन्यस्य शोधनार्थमुपयुक्तः, चतुष्के महाकषायवर्गे प्रोक्त एको गणः, पाठामहौषधसुरदारुमुस्तमूर्वागुडूचीवत्सकफलकिराततिक्तककटुरोहिणीसारिवेति दशेमानि द्रव्याणि स्तन्यशोधनानि** ( चसू. ४.१२ )
दूषित दूध शुद्ध करणारा गण– मोठ्या काढ्याच्या वर्गातील (महाकषाय) एक गण. पहाडमूळ, सुंठ, देवदार, नागर मोथा, मोरवेल, गुळवेल, इंद्रजव, काडेचिराईत, कुटकी, अनंतमूळ. ही दहा द्रव्ये स्तन्यशोधक आहेत.

**-संजनन**–वि., **स्तन्योत्पादकं तस्य वर्धकं वा ( भेषजम् )** ( चचि. ३०.२२९ )
स्तन्य उत्पन्न करणारे किंवा ते वाढविणारे औषध.

**-संपद्**–स्त्री., **सुष्ठु स्तन्यम्**, द्र० **स्तन्यगुणप्रकर्षः** 'स्तन्य' ( चशा. ८.५४ )
गुणांनी संपन्न दूध, दुधाचे गुण उत्कृष्ट असणे, दुधातील गुणरूप संपत्ति.

**स्तन्यागमोत्थज्वर**–पु., रोग० **सूतिकाज्वरभेदस्यैको भेदः** (काखिल. ११.६३-६५) द्र० **'सूतिकाज्वर'**
बाळंतिणीला दूध येताना येणारा ताप, बाळंतिणीच्या तापाचा एक प्रकार. पहा–' सूतिकाज्वर '

**स्तन्यावतरण**–न., **स्तन्यस्य प्रथममुन्मुखीभवनम्** ( ड. सुउ. ३९.२२ ) दूध प्रथम येणे.

**स्तन्याशय**–पु., शारीर० **आशयविशेषः, स्तन्यसंचयस्थानम्, क्षीराशयः** ( चचि. ३०.२४३ )
दुधाचा आशय (स्थान) दूध संचित होण्याचे स्थान, स्तन.

**स्तबकफल**–पु., वनस्पति० **तेजःफलः** (रापरि. ११.१७; पृ. ३७४ )
सावरीच्या फळासारखी पुष्कळ व वास येणाऱ्या फळांचा काटेरी वृक्ष.

**स्तबकाह्वकन्दक**–पु., वनस्पति० **गुच्छाह्वकन्दः** ( रापरि. ७.६१; पृ. ३५२ )
अनेक कंदांचा गुच्छ असणारा कंद.

**स्तब्ध**–वि., **क्रियाविरहितः** ( चसि. १.३२ ) **निश्चलः** ( सुचि. २५.५ )
निश्चल, क्रियाविरहित, स्थिर.
**वर्तुलः** ( चक्र. चचि. ५.४३ ) वर्तुळ.

**-कोष्ठ**–पु., लक्षण० **स्तम्भयुक्तो गतिविरहितः कोष्ठः** ( चसि. ७.४८ )
गतिविरहित कोठा, अवरोध असलेला कोठा.

**-गात्रता**–स्त्री., **जान्वादेरनमनसामर्थ्यम्, गात्रस्तम्भः** ( सुसू. १५.२४-२६ )
गुडघा इत्यादी सांध्यात अवयव न वाकणे.

**-ता**–स्त्री., **क्रियाहीनत्वम्, निश्चलत्वम्** ( चसू. ५.९० )
क्रियाहीनत्व, निश्चलत्व, हालचाल बंद झालेले.

**-नेत्र**–वि., लक्षण० **स्तब्धाक्षः, नेत्रस्तम्भवान्** ( काखिल. १३.३८ )
डोळे स्थिर असलेला. डोळ्यांची हालचाल बंद झालेला.

**–पादता**–स्त्री., लक्षण० **पादस्य स्थैर्यम्**
( सुशा. ६.२४ )
पाय जखडणे, पायांची हालचाल बंद होणे.

**–बाहुता**–स्त्री., लक्षण० **बाहुक्रियानाशः**
( सुशा. ६.२६ )
बाहूंची हालचाल बंद होणे. बाहू जखडणे.

**–मेढ्र**–पु., लक्षण० **स्तब्धलिङ्गः अरिष्टलक्षणमिदम्**
( सुसू. ३२.४ )
लिंग ताठ असलेला. हे मरण सूचक चिन्ह आहे.

**–रोमता**–स्त्री., लक्षण० **रोम्णां स्तब्धता**
( अहृसू. ११.२२ )
केस उभे होणे, ताठ होणे.

**–सक्थिता**–स्त्री., लक्षण० **ऊरुस्तब्धत्वम्**
( सुशा. ६.२४ )
मांड्या ताठरणे, मांड्यांची हालचाल न होणे.

**–सिरत्व**–न., लक्षण० **अमृदुसिरात्वम्**
( ड. सुचि. १.७ )
शिरांचा मऊपणा जाणे. शिरा कठीण होणे. दडस होणे.

**–स्नायुत्व**–न., लक्षण० **अमृदुस्नायुत्वम्**
( सुचि. १.७ )
स्नायु कठीण होणे, स्नायूंची हालचाल बंद होणे.

**स्तम्बिनी**–स्त्री.,**वीरुधः प्रकारविशेषः, वर्तुललता-सन्ततिविटपः, ताश्च विदारीकोलवल्लीशालपर्णी-पृश्निपर्णीप्रभृतयः** ( ड. सुसू. १.२९ )
ताणे असलेल्या वर्तुळाकार वाढणाऱ्या वनस्पती. भुइकोहळा, चवक, सालवण, पिठवण इत्यादी.

**स्तम्भ**–पु., रोग० **अशीतिवातविकारेष्वेकः**
( चसू., २८.२१ )
अवयवास ताठरपणा येणे, ८० वातविकारांपैकी एक. हालचाल बंद होणे.
**लक्षण० निश्चलीकरणम्** ( चसू. १३.७५ ) **दण्डवत् स्तब्धता** ( सुचि. ५.६ ) **जडिमा** (सुउ. ४३.८) **बाहूरुजङ्घादीनां सङ्कुञ्चनाद्यभावः** ( अरु. ) **निष्क्रियत्वम्** ( हे. अहृसू. १२.५१ )
हाल चालबंद होणे, लाकडासारखी स्तब्धता, जडपणा, बाहू मांड्या पिंढरी इत्यादी अवयव आकुंचित न होणे, निष्क्रिय होणे.

**स्तम्भन**–पु., न., उपक्रम० **स्तम्भयतीति स्तम्भनः** ( चसू. २६.४३(६) **स्थिरीकरणम्** ( सुनि. १.३१) **यद्द्रव्यं शीतं, मन्दं, मृदु, श्लक्ष्णं, रूक्षं, सूक्ष्मं, द्रवं, स्थिरं, लघु, तत्स्तम्भनं स्मृतम्; यदौषधं, द्रवं, तन्वसरं, स्वादु, तिक्तं, कषायं, शीतीकरणं तत्सर्वं स्तम्भनम्, स्तम्भनीयरोगाः–पित्तक्षाराग्निदाहा वम्यतिसारौ विषस्वेदातियोगाः, युक्तस्तम्भितलक्षणम्–बलप्राप्तिरामयनाशश्च; अतिस्तम्भितलक्षणम्–श्यावता; स्तब्धगात्रता, हनुग्रहो हृद्वर्चोनिग्रह उद्वेगः,** ( चसू. २२.१७, ३२.३३, ३९.४० ) **त्वक्स्नायुसंकोचकम्पवाग्ग्रहाः** ( असंसू. २६.२८ )
स्तंभन करणे, थांबवणे. एक उपचार. स्थिर करणे. जे द्रव्य थंड, मंद, मऊ, गुळगुळीत, रूक्ष, सूक्ष्म द्रव, (पातळ) स्थिर, हलके ते स्तंभन. जे औषध पातळ (पाण्यासारखे) सूक्ष्म, स्राव थांबवणारे, गोड, कडु, तुरट, थंडावा आणणारे ते सर्व स्तंभन.
**स्तंभन करणे आवश्यक असे रोग**— पित्त, क्षार, अग्नि यांनी दाह होणे. ओकारी, अतिसार, विष, अतिशय घाम. (अति शेकण्याचा परिणाम).
**स्तंभन झाल्याची लक्षणे**–बळ येणे, रोगनाश.
**स्तंभन अतिशय झाल्याची लक्षणे**— काळसरपणा, अवयव आणि हनुवटी जखडणे, हृदय व मळ यांचा अवरोध, उद्वेग, त्वचा, स्नायु यांचा संकोच, कंप, वाचा अडखळणे.
**लक्षण० स्तब्धता** ( सुसू. २२.११ )
आखडणे, जखडणे, थांबणे, न सरणे.
**लेप० अयमस्रातिप्रवृत्तौ समुपयोज्यः**
( असंउ. ३० )
लेप. रक्तस्राव फार होत असताना उपयुक्त.

( **स्तम्भनी** )–स्त्री., **रेवतीग्रहविशेषः** (कारेवती. क ४०)
एक रेवती बालग्रह.

**स्तम्भनी**–स्त्री., थांबणारी, थांबविणारी.

**–क्रिया**–स्त्री., उपक्रम० **स्तम्भनकर्म द्र० ' स्तम्भन '.**
( अहृसू. २७.४८ )
प्रवाह-गति थांबविणारी क्रिया. पहा ' स्तंभन '.

**स्तम्भित**–वि., **स्तम्भनोपक्रान्तः** ( अहृसू. १७.२० )
स्तंभनाचा उपचार केलेला. मल रक्त इत्यादिकांचा स्राव उपचाराने थांबलेला.

**स्तम्भिन्**–वि., **स्तम्भनं कर्तुं शीलमस्येति, स्तम्भनकारकः द्र० ' स्तम्भन '** ( अहृसू. १५.२७ )
स्तंभन करणारा, स्तंभन कारक.

**स्तवक्षीरी**–स्त्री., वनस्पति० गन्धपलाशः ( रा. ६.८९; पृ. १९ )
कचोराप्रकार.

**स्तिमित**–वि., **अप्रचलितरूपः** ( ड. सुउ. ३९.१०१-१०२ ) **आर्द्रम्**, **जडम्** ( ड. सुसू. ४१.४ (२)) **स्तब्धम्** ( **असंनि. ३.३०** )
चलन थांबलेला. हालचाल बंद असलेला, ओले, जड, स्थिर, थांबलेले. ओला.

–**त्व**–**लक्षण**० **स्तब्धत्वम्** ( चनि. १.२७ )
निश्चलत्व, ओलावा, जडत्व, स्थिरत्व.

–**रुजू**–स्त्री., **लक्षण**० **मन्दवेदना** ( सुनि. १०.१२ )
वेदना थांबणे, कमी वेदना असणे.

**स्तुत्या**–स्त्री., **वनस्पति**० **नलिका** ( रा. १२.८८; पृ. १०४ )
नलिका. गुलछबु, घेवडा.
खनिज० **सौराष्ट्री** ( रा. १३.१६५; पृ. ११६ )
तुरटी.

**स्तेय**–न., **चौर्यम्** ( अहसू. २.२१ ) चोरणे.

**स्तेयीफल**–पु., **वनस्पति**० **तेजःफलः** ( रापरि. ११.१८; पृ. ३७४ )
सावरीच्या फळासारखी पुष्कळ व वासाची फळे असलेला काटेरी वृक्ष.

**स्तैमित्य**–न., **लक्षण**० **स्तेम आर्द्रीभावस्तस्य भावः**, **आर्द्रपटावगुण्ठितत्वम्** ( चवि. ८.९६; सुउ. ३९.४९ ) **जाड्यम् मान्द्यम्**, **बाधिर्यम्** ( अहसू. १२.५३ )
स्तेम म्हणजे ओल तिचे भाववाचक ओलावा–ओलेपणा. ओले कापड गुंडाळल्यासारखे वाटणे. जडपणा, मंदपणा, बहिरेपणा.
**शैत्येन घृतादिषु यद्घनीभवनम् तत्** ( चवि. ८.९८)
थंडाव्याने तूप इत्यादिकांचे ठिकाणी घट्टपणा येणे.
**रोग**० **विंशतिश्लेष्मविकारेष्वेकः** (चसू. २०.१७)
एक रोग. २० कफरोगांपैकी.

**स्तोकक**–न., **वनस्पति**० **वत्सनाभः** ( ध. ७.१२८ पृ. ३१६ )
बचनाग.

**स्तोमक्षार**–पु., **भैषज्य**० **सर्वक्षारः** (रा. ६५७ पृ. ७६)
सर्वक्षार. सगळ्या क्षारांचा समूह.

**स्त्यान**–वि., **सान्द्रम्**, **घनम्** ( चसू. १८.७)
घट्ट, दाट,

**स्त्री**–स्त्री., **वर्धते स्त्यायत्यस्यां गर्भ इति।** (चशा. ४.७) **अपत्यानां मूलम्**, '**सा रक्षिता**' (असंशा २.६४)
स्त्री. जिच्या ठिकाणी गर्भस्त्यायति म्हणजे वाढतो ती. अपत्यांचे मूळ. तिचे रक्षण केले तर, ती अपत्याचे रक्षण करते.

–**घृत**–न., **भैषज्य**० **तद्गुणाः**–**लघु**, **चक्षुष्यं**, **देहवर्धनं**, **दीपनं**, **तर्पणं**, **रुच्यं**, **विषनेत्ररोगदाहनाशनम्** ( ध. ६.१५५ पृ. २३८ )
मानवी स्त्रीचे दुधाचे तूप. **गुण**–हलके, डोळ्याना हितकर, शरीर वाढविणारे, अग्निदीपक, तृप्ति करणारे, पौष्टिक, रुचकर, विष, डोळेरोग यांचा दाहनाशक.
**घृतवि**० (ध. ६.१५५) एक तूप.

–**दधि**–न., **भैषज्य**० **मधुरमम्लं**, **स्निग्धं**, **गुरु**, **बल्यं**, **सन्तर्पणं**, **चक्षुष्यम्**, ( ध. ६.१९८ पृ. २४५ )
मानवी स्त्रीच्या दुधाचे दही. –गोड, उष्ण, स्निग्ध जड, बलवर्धक, पौष्टिक, डोळ्यांना हितकर.
**दधि**० ( ध. ६.१९८ ) एक दही.

–**दोष**–पु., **स्त्रीदत्तगरादिदोषः** ( चचि. २३.५९ )
स्त्रीने दिलेले गर इत्यादी दोष.

–**नामन्**–न., **पक्षि**० **स्त्रीसंज्ञखगः** ( असंशा. १२.९ )
स्त्रीनावाचा पक्षी.

–**नित्य**–वि., **स्त्रीसेवनं नित्यं कर्म यस्य सः**, **असौ स्नेहयोग्यः** ( चसू. १३.५२ )
स्त्रीसंभोग नेहमी करणारा. हा स्नेह देण्यास योग्य.

–**पुंसलिङ्गिन्**–वि., **स्त्रीपुरुषसाधारणो नासाचक्षुरादिलिङ्गयुक्तो द्विरेता भवति। यानि तु स्त्रीपुंसयोरसाधारणान्युपस्थध्वजस्तनश्मश्रुप्रभृतीनि, तानि चास्य न संभवन्तीति** ( चशा. २.१८ )
स्त्री व पुरुष यांची समान लक्षणे असलेला, विशेष लक्षणे नसलेला. नाक डोळे इत्यादी सामान्य लक्षणे असलेला परंतु असाधारण विशिष्ट लक्षणे असलेला पुरुषाची लिंग, मणी, दाढी व स्त्रीची योनि, स्तन इत्यादी लक्षणे नसलेला.

–**पुष्प**–न., **स्त्रीणामार्तवम्** ( र. ३.७६ )
स्त्रीचे रज. रजःस्राव.

–**प्रसङ्ग**–पु., **स्त्रीसंगः**, **अयं शोषकराणां श्रेष्ठः** ( चसू. २५.४० )
स्त्रीसंग, संभोग. हा क्षयरोगकर अशा कारणांमध्ये श्रेष्ठ.

-**मलापहा**-स्त्री., वनस्पति० धूम्रपत्रा (रापरि. ५.८; पृ. ३४०.)
एक वनस्पती.

-**मुखमधुदोहल**-पु., वनस्पति० बकुलः (रा. १०.२६२; पृ. २०२)
बकुळ.

-**विग्रह**-पु., नारीदेहः (असंउ. ३) स्त्रीचा देह.

-**व्यापद्**-स्त्री., स्त्रीरोगः, स्त्रीनिमित्ता आर्तवदोषकृता व्यापत् (चशा. ४.३०)
स्त्री म्हणून रजोदोषांनी झालेले विकार.

**स्त्रैण**-वि., स्त्रीलोलुपम्, (पैशाचसत्वम्) (चशा. ४.३८(३)), स्त्रीस्वभावयुक्तम् (चशा. ८.२१)
स्त्रीलोलुप, स्त्रियांच्या स्वभावाने युक्त.

**स्थगिका**-स्त्री., सविषमक्षिकाविशेषः। अस्या दंशेन मरणमपि भवति (चचि. २३.१५८)
विषारी माशी. हिच्या दंशाने मरणही ओढवते.
**व्रणबन्ध० स्थगिकाबन्धः** (सुसू. १८.१७-१८)
व्रण बांधावयाचा बंध.
**ताम्बूलकरङ्कः** (सुसू. १८.१७-१८)
विड्याचा करंडा-डबा.

-**बन्ध**-पु., बन्ध० अङ्गुष्ठाङ्गुलिमेढ्राग्रेषु स्थगिकाबन्धो विधेयः (सुसू. १८.१७-१८) **मूत्रवृद्धिरोगे उपयुज्यते** (असंचि. १५)
व्रणावर बांधावयाचा स्थगिक नावाचा बंध (पट्टा). आंगठा, करंगळी, शिश्न यांच्या टोकावर बांधण्यास उपयुक्त.

**स्थण्डिल**-न., भूमिः, पूजनस्थानम् (चक्र. चशा. ८.१०) **संस्कृताभूः** (सुसू. २.४)
पूजेचे स्थान, यज्ञाकरिता केलेली जमीन, व्रताचे साधन करण्याकरिता केलेला ओटा.

**स्थपनि**-स्त्री., वनस्पति० स्थपनी (असंसू. १६.२७)
पहाडमूळ.

**स्थपनी**-स्त्री., मर्म० स्थपनीमर्म (असंशा. ७.२३) **भ्रुवोर्मध्ये स्थपनी नाम तत्रोत्क्षेपवत्** (सुशा. ६.२७) **शिरोमर्म** (सुशा. ६.६) **विशल्यघ्नमर्म** (सुशा. ६.११) **सिरामर्म** (सुशा. ६.७) **मर्मसंख्या एका स्थपनी** (सुशा. ६.६) **स्थपनीमर्म मानमर्धाङ्गुलम्** (ड. सुशा. ६.२७)
शिरांतील मर्मे. दोन्ही भुवयामध्ये हे आहे. शल्य- काढल्याने मरण ओढवणारे मर्म. शिरा जातीचे एकच मर्म.
**पाठा** (असंसू. १६.२७) पहाडमूळ.
**नासानेत्रगता सिराविशेषः** (असंशा. ६.१९)
नाक व डोळे यात गेलेली शीर.

**स्थलपिण्डा**-स्त्री., वनस्पति० पिण्डखर्जुरिका (ध. ५.५५; पृ. १७९)
पेंडखजूर.

**स्थलशृङ्गाटक**-पु., वनस्पति० क्षुद्रगोक्षुरः द्र० 'गोक्षुर' (रा. ३.१३२; पृ. २६)
लहान गोखरू.

**स्थलसंभव**-न., भूमिसंभवम् (धान्यम्) (असंसू. ७.३८)
जमिनीत होणारे (धान्य).

**स्थलेरुहा**-स्त्री., वनस्पति० दग्धा (रापरि. ९.२८ पृ. ३३६)
जमिनीत वाढणारी लव असलेली खरखरीत पानांची वनस्पती. दुसरे नाव दग्धरुहा.
**कुमारी**. (रापरि. ५.१०, पृ. ३४०)
कोरफड.

**स्थविमन्**-पु., लक्षण० स्थूलता, स्थौल्यम् (असंउ. ४९.४०६)
स्थूलता, लठ्ठपणा.

**स्थविर**-वि., वृद्धः (सुचि. २६.४) वृध्द, म्हातारा.
**खनिज० शैलेयम्** (ध. ३.७३; पृ. ११०)
शिलाजतु.

(**स्थविरा**)-स्त्री., वनस्पति० महाश्रावणिका (रा. ५.२२०; पृ. ३८)
मुंडी.

-**जीवक**-पु., वृद्धजीवकः, काश्यपसंहितायाः कर्ता (काक षट्कल्याध्यायः ३)
काश्यपसंहितेचे कर्ते वृद्ध जीवक.

**स्थाणु**-पु., देवता० शङ्करः (असंनि. १.५) शंकर.

**स्थान**-न., वास्तव्यम्, वसतिः (चनि. ७.७ (३) **अधिष्ठानम्** (सुसू. ४१.१२) **अधिकरणम्** (चसू. ३०.७०)
वास्तव्य, वस्ती, स्थान, निवासस्थान, अधिष्ठान.
**ऊर्ध्वीभूतस्य स्थितिः** (ड. सुसू. १९.१२)
उभी स्थिति, उभे असणे.
**स्वमानावस्थानम्** (चसू. १७.११२)
स्वतःच्या प्रमाणात असणे, सम असणे.

कारणम्, तिष्ठति उत्पद्यतेऽस्मादिति स्थानं कारणमिति युक्तम् ( चक्र. चसू. १९.३ ) कारण.

**शरीरधात्ववकाशविशेषः नाम स्रोतः** ( चवि. ५.९ )

शरीर धातूतील एक पोकळी, स्रोतस्.

**-कोपप्रसाद**-वि.,**स्थाने उचिते समये प्रसंगे पुरुषे वा कोपः प्रसादश्च यस्य सः ( स्थानकोपप्रसादः )** ( चशा. ४. ३७(५ )

योग्य अशा वेळी प्रसंगी पुरुषावर रागावणारा किंवा प्रसन्न होणारा.

**-परित्याग**-पु., **निवासभूमित्यागः** ( सुसू. ६.२० )

राहण्याची जागा सोडणे.

**-विभाग**-पु., **स्थानस्य विभागः, यथा वातादिदोषाणाम्** ( चसू. २०८ )

स्थानाचा विभाग. जसे वातादि दोषांचा स्थान विभाग.

**-संश्रय**-पु., **संप्राप्तेरवस्थाविशेषः चतुर्थः क्रियाकालः, दोषाणां स्रोतोवैगुण्यात् शरीरस्थाने सङ्गः** ( सुसू. २१.३३ )

संप्राप्तीचा अवस्थाविशेष, उपचारांचा चवथा काल. पूर्वरूपावस्थेचा काल. तत्तत्स्थानानुगामी दोषांचा शरिराच्या त्या त्या ठिकाणी संचय होणे. किंवा त्या त्या स्थानाच्या स्रोतसांच्या वैगुण्याने त्या त्या स्थानात दोष संचय होणे.

**-स्थ**-वि., **आशयस्थः** ( चवि. ५.९ ) **साम्यावस्थितः' अक्षीणः** ( सुनि. ११२ )

स्वतःच्या आशयातच असलेला. साम्यावस्थेतला. क्षीण नसलेला व न वाढलेला (दोष).

**स्थानान्तर**-न., **स्थलान्तरम्** ( अहृसू. १२.६५ )

स्थलांतर, अन्य स्थानी जाणे.

**स्थानापवर्तन**-न., **स्थानेषु सक्तस्य गर्भस्य गर्भशय्यात उत्तानस्यावाङ्मुखीकरणम्** ( ड. सुचि. १५.३ )

गर्भाशयात एके ठिकाणी अडलेल्या वर तोंड असलेल्या गर्भाचे तोंड ( डोके ) फिरवून खाली करणे.

**स्थापना**-स्त्री., **सिद्धमर्थं परं प्रति स्थापयति, साधयतीति स्थापना। प्रतिज्ञाया हेतुदृष्टान्तोपनयनिगमनैः स्थापनम्** ( चवि. ८.३१ )

स्थापित करणे. सिद्ध झालेली गोष्ट दुसऱ्याला सिद्ध करून दाखविणे. प्रतिज्ञेची स्थापना, हेतु, दृष्टांत, उपनय, निगमन यांनी करणे.

**स्थापनी**-स्त्री., वनस्पति० **पाठा** ( ध. १.७०; पृ. २० )

पहाडमूळ.

**स्थापनीय**-वि., **आस्थापनबस्तिप्रयोगयोग्यः** ( सुचि. ३५.२२ )

निरूहबस्ती देण्यास योग्य.

**स्थालक**-न., **अस्थिभेद० पर्शुकाया मूलस्थानम्** ( चशा. ७.६ )

हाडांचा एक प्रकार. फासळी प्रारंभी जेथे चिकटलेली असते ते हाड.

**(स्थालिका)**-स्त्री., **कीट० मक्षिकाविशेषः, असौ प्राणहरा, तया दष्टस्य कण्डूशोफदाहरुजो भवन्ति, तथा च श्यावपिडकोत्पत्तिरुपद्रवा ज्वरादयश्च भवन्ति। असौ असाध्या** ( सुक. ८.३५, असंउ. ४३ )

एक विषारी माशी. ही प्राणहर आहे. तिने दंश केला तर खाज, सूज, दाह, वेदना होतात. तसेच काळी पुळी होते व ज्वर इत्यादी उपद्रव होतात. हा दंश असाध्य.

**स्थालकार्बुद**-न., **पर्शुकामूले स्थितमर्बुदाकारमस्थि** ( चशा. ७.६ )

फासळीच्या मुळाशी असलेले अर्धगोलाकार-अर्बुदाच्या आकाराचे हाड.

**स्थाली**-स्त्री., वनस्पति० **पाटला** ( ध. १.१२० पृ.२९ )

पाडळ.

**-पाक**-पु., **स्थालीस्थः पाकः, चरुः** ( चशा. ८.११ )

थाळीत असलेला, शिजविलेला, होमाचा भात.

**-यन्त्र**-न., यन्त्र० **अन्येन शरावेणाऽऽच्छादितमुखस्ताम्रादियुक्तः शरावः, यस्याधस्तादग्निर्दीयते। तेन च ताम्रादिः पच्यते** ( र. ९.६८ )

एका थाळीत ताम्र इत्यादी द्रव्ये घालून वर दुसरी थाळी आच्छादून खाली अग्नि लावून पचवतात व त्याचे भस्म करतात.

**स्थावर**-वि., **स्थिरः, क्षितिस्थः यथा वृक्षपाषाणादि;** ( चसू. २६.३९ )

**स्थितिशीलः** ( सुसू. १.२२ )

स्थिर, जमिनीवर असणारे. जसे वृक्ष दगड इत्यादी, एकाच ( एकमेव ) स्थिर स्थितीत असणारे.

पु., **जडो वृक्षपाषाणादिः** ( चसू. २६.३९ ) **चत्वारः प्रकाराः—— वनस्पतिर्वृक्षो वीरुदौषधिश्च, तत्र स्थावरेभ्यस्त्वक्पत्रपुष्पफलमूलकन्दनिर्यासस्वरसा-**

**दयः प्रयोजनवन्तः, स्वरसादय इत्यादिग्रहणात् तैलक्षारभस्मकण्टकप्रभृतीनां ग्रहणम्** ( ड. सुसू. १.२९–३१ )
जड. झाडे दगड इत्यादी. प्रकार चार–(१)फुले न येता फळे येणारी (२) फुले व फळे येणारी (३) धागे ताणे असलेली (४) फळे पिकल्यानंतर मरणारी झाडे यांपासून साल, पाने, फुले, फळे, मुळे, कंद, डिंक, रस, तेल, क्षार, भस्म, काटे इत्यादी उपयुक्त वस्तु मिळतात.

**–विष**–न., **विषप्रकारेष्वेकः** द्र० ' **विष** ' ( चचि. २३.१६; सुक. २.५ )
विषांचा एक प्रकार.

**–विषविज्ञानीय**–वि., **अध्यायसंज्ञा०** ( सुक. २.१ )
अध्यायाचे नाव. यात स्थावर विषांविषयी माहिती आहे.

**स्थावरोत्पत्ति**–स्त्री., **वृक्षोत्पत्तिः, असौ गुल्मेषु कोष्ठकल्पिता अरिष्टभूता** ( सुसू. २९.६९-७१ )
वृक्षाची उत्पत्ति. गुल्मरोगात जर पोटात झाड उगवल्याचे स्वप्न पडले तर ते मरणसूचक आहे.

**स्थित**–वि., **झटित्यूर्ध्वं गच्छन्** ( चक. चसि. ६.३३ )
**ऊर्ध्वीभूतः** ( सुशा. ८.६ )
झटकन् वर गेलेला, वर झालेला, उभा राहिलेला.

**स्थिति**–स्त्री., **स्थायिभावः** ( चसू. १८.४४ ) **स्थैर्यम्** ( सुशा. ३.३३ )
स्थायीभाव, स्थैर्य, स्थिरता, स्थिरत्व.
**जीवनरूपा अवस्था** ( चचि. २८.२२० ) **अस्तित्वम्** ( सुशा. १.१५ )
जीवनरूप अवस्था, अस्तित्व, जिवंत असण्याची स्थिती.
**ऊर्ध्वस्थितिः, ऊर्ध्वीभावः** ( सुचि. २४.१२० )
उभी अवस्था, उभे होणे, वर असणे.

**स्थिर**–पु., **गुण० विंशतिगुणेष्वेकश्चलविपरीतो गुणः** ( चसू. १.६१ ) **निश्चलः चलप्रतिबन्धकः** ( चशा. ६.१० ) **सरविपरीतः पार्थिवद्रव्यगुणः** ( सुसू. ४१.४ (१) **अस्य धारणे शक्तिः** ( अहसू. १.१८ )
वीस गुणांपैकी एक. चलाच्या विपरीत स्थिर. हालचाल नसलेला, दीर्घकाल राहणारा, प्रतिबंध करणारा, सराच्या विपरीत, पार्थिव द्रव्यांचा गुण. धारण करण्याची शक्ति.
वि., **कठिनः, दृढः** ( सुसू. ३२.३ ) कठिण.
**स्थावरम्** ( **विषम्** ) ( चचि. २३.१३ )
खनिज किंवा उद्भिज्ज.

( **स्थिरा** )–स्त्री., **वनस्पति० शालिपर्णी** ( चसू. ५.६४; सुउ. ३९.२१९; ध. १.८७; पृ. २३ ) सालवण.
**पृश्निपर्णी** (चसू. ५.६४; अहसू. २०.३७) पिठवण.

**–कुसुम**–पु., **वनस्पति० बकुलः** ( रा. १०.२६२; पृ. २०२ )
बकुळ.

**–गन्ध**–पु., **वनस्पति० चम्पकः** ( रा. १०.२३९; पृ.१९९) चाफा ( सोनचाफा ).

(**गन्धा** )–स्त्री., **वनस्पति० पाटला** ( रा. ९.१५०; पृ. २९ ) पाडळ.
**केतकी** ( रापरि. १०.२; पृ. २०४ ) केवडी.

**–गात्रता**–स्त्री., **लक्षण० गात्राणां स्थिरता, गात्रस्थैर्यम्** ( चसू. १३.४५ )
गात्रे स्थिर असणे, अवयवांची हालचाल न होणे.

**–त्व**–न., **अशैथिल्यम्** ( चसू. १८.५१ ) **अचलनम्** ( सुक. ३.४१-४२ )
ढिलेपणा नसणे, चलनवलन नसणे.

**–नयन**–वि., **चक्षुषः निमीलनोन्मीलनरहितः, निमेषरहितः** ( ड. सुउ. ६०.८ )
डोळे स्थिर असणे. डोळ्याची उघडझाप न होणे, उघडझापरहित डोळ्याचा, थिजलेल्या डोळ्याचा.

**–पत्र**–पु., **वनस्पति० हिन्तालः** (रा. ९.९८; पृ. १८२)
शिंदी.

**–पुष्प**–पु., **वनस्पति० तिलकः** ( रा. १०.२६६; पृ. २०२ )
तिळवा.
**चम्पकः** ( रा. १०.२३९; पृ. १९९ ) चाफा.

**–फला**–स्त्री., **वनस्पति० कूष्माण्डिका** ( ध. १.१८३; पृ. ४३ )
कोहळा.

**–बन्धन**–न., **दृढबन्धनम्** ( सुचि. २२.२९ )
दृढ बंधन, घट्ट बांध. न सुटणारे बंधन.

**–मद**–वि., **चिरकालमत्तताकारी** ( **सुरासवः** ) ( सुसू. ४५.१८७.१८८ )
पुष्कळ वेळ माज करणारे सुरेचे आसव.

**–मांस**–न., **अमृदुमांसम्** ( सुचि. १७३.७४ )
कठिण मांस, सारवान मांस, दृढ मांस.

**-मूल**-वि., **दृढमूलम्** ( असंसू. ३९.१२; अहृसू. ३०.३३ )

दृढमूल, बळकट.

**-रङ्गा**-स्त्री., वनस्पति० **नीलिनी** (रा.४.३५१;पृ.५५)

काळा दाणा.

**-रागा**-स्त्री., वनस्पति० **दारुहरिद्रा** ( रा. ६.८;३, पृ.१८. )

दारुहळद.

**-व्रणता**-स्त्री., लक्षण० **कठिनव्रणता** (सुसू. १२.८)

व्रण कठीण असणे.

**-शरीर**-वि., **कठिनशरीरावयवः** ( सुनि. ८.१० )

ज्याच्या शरिराचे अवयव कठीण आहेत असा.

**-साधनक**-पु., वनस्पति० **निर्गुण्डी** ( रा. ४.११७; पृ. १५० )

निर्गुंडी.

**-सुप्तकुष्ठ**-न., रोग० **महाकुष्ठ काकणाख्यम्** द्र० '**काकणकुष्ठ**' ( र.२०.२६ )

मोठे कुष्ठ ( काकण नावाचे )

**स्थिरसा**-स्त्री., वनस्पति० **सागः** ( रा परि. ९.६ पृ. २०४ )

साग.

**स्थिरा**-स्त्री., सालवण.

**-द्वय**-न., वनस्पति० **शालिपर्णी पृश्निपर्णी च** ( अहृसू. १५.६ )

सालवण पिठवण जोडी.

**स्थिराङ्गता**-स्त्री., लक्षण० **कठिणाङ्गता** ( सुउ. ४२.६७)

कठिण अंग असणे.

**स्थिराङ्घ्रिप**-पु., वनस्पति० **हिन्तालः** ( रा. ९.९८ पृ. १८२ )

शिंदी.

**स्थिरात्मता**-स्त्री., **स्थिरप्रकृतिकत्वम्** ( असंसू. ९.३६ )

स्थिर प्रकृती असणे. थोड्याशा कारणाने न ढासळणारी प्रकृति असणे; चिंता, रोग इत्यादींचा चटकन परिणाम न होणारी प्रकृति-शरीर.

**स्थिरादिवर्ग**-पु., द्रव्यगण० **लघुपञ्चमूलम्, असौ प्रतिरुद्धवाते उपयुक्तः** ( चचि. २६.२३ )

लहान पंचमूळ. सालवण, पिठवण इत्यादी. हा वर्ग अडलेल्या वाताच्या अवस्थेत उपयुक्त.



**स्थिरीकरण**-वि., **स्थैर्योत्पादकः** ( **तिक्तरसः** ) ( चसू. २६.४३ )

स्थिरत्व उत्पन्न करणारा (कडु रस), स्थैर्य निर्माण करणारा.

**स्थिरेन्द्रिय**-वि., **अचलेन्द्रियः** ( सुसू. ३५.५ )

इंद्रिये स्थिर असलेला. इंद्रिये चल नसलेला.

**स्थिरोपचितमांस**-वि., **कठिणस्थिरमांसः** ( **स्त्रीसंयतः** ) ( ड. सुचि. २४.११३ )

चिंता, विकार इत्यादी कारणांनी चटकन कृश शिथिल न होणाऱ्या मांसाचा. कठिण व स्थिर मांसाचा, स्थिर व पुष्ट मांसाचा.

**स्थूणा**-स्त्री., **स्तम्भः, धारणम्** ( सुसू. २१.३ )

स्तंभ, खांब, धारण करणे, आधार.

**स्थूणिका**-स्त्री., आहारद्रव्य० **वटकः, पिष्टकासमर्दकूष्माण्डमूलकादिकृता मुद्गादिकृताश्च, तद्गुणाः- विष्टम्भिनी, वातकोपनी च** ( सुसू. ४६.२९४,२९५ )

आहारातील पदार्थ. वडा. पीठ किंवा मुगाची डाळ यात कासविंदा कोहळा, मुळा इत्यादी घालून केलेला वडा. अवष्टंभ व वात करतो.

**-शुष्कशाक**-न., आहारद्रव्य० **नानाशाकैः कृतो वटकः** ( सुसू. ४६.२९४ )

नानाप्रकारच्या भाज्यांनी केलेला वडा.

**स्थूल**-वि., **स्थौल्यव्याधियुक्तः** ( चसू. १४.१७) **मेदस्वी, अष्टौ निन्दितपुरुषान्यतमः** ( सुसू. १५.३५ )

स्थूलता या विकाराने युक्त. मेदस्वी लठ्ठ. आठ निंद्य पुरुषांपैकी एक प्रकार.

पु., गुण० **विंशतिगुणेष्वेकः, उपचयकरो गुणः, सूक्ष्मविपरीतो गुणः** (चशा. ६.१०) **पार्थिवद्रव्यगुणः** ( सुसू. ४१.४ ( १ ) **अस्य संवरणे शक्तिः** ( हे. अहृसू. १.१८ )

जाड. जाडजूड. वीस गुणांपैकी एक. सूक्ष्माच्या विपरीत गुण. पुष्टि करणारा गुण. हा पार्थिव द्रव्यांचा गुण आहे. यात झाकण्याचा गुण आहे.

वनस्पति० **पनसः** (रापरि. ११.९; पृ. ३७३)

फणस.

धान्य० **व्रीहिः** (रा. १६.७९; पृ. २२०)

तांदळाचा प्रकार.

**( स्थूला )**-स्त्री., वनस्पति० **उर्वारुकम्** (ध. १.१७६; पृ. ४९)

मोठी काकडी.

कार्पासी (रापरि. ४.४५; पृ. ३३८) कापशी.

**–कङ्गु**–पु., **वनस्पति० प्रियङ्गुः**
(रा. १६.१४४; पृ. २२६)
गव्हला.

**–कणा**–स्त्री., **वनस्पति० उपकुञ्ची**
(रा. ६.९१ पृ. ९१)
काळे जिरे.

**–कण्टक**–पु., **वनस्पति० जालबर्बुरः**
(रापरि. ८.१४ पृ. ३५७)
मोठ्या काट्याची लहान फांद्याची बाभूळ.

**–कण्टा**–स्त्री., **वनस्पति० बृहती**
(रा. ४.१२०, पृ. २४)
डोरली.

**–कण्टाकी**–स्त्री., **वनस्पति० बृहती**
(ध. १.९३ पृ. २४)
डोरली.

**–कन्द**–पु., **वनस्पति० ग्राम्यकन्दः, सकलकन्दः**
(ड. सुसू. ४६.३०७) **लशुनः**
(रा. ७.९६; पृ. १४७)
लसूण. गावठीकंद, कंदप्रकार.
**वनस्पति० मुखालुः** (रापरि. ७.२२; पृ. ३४९)
एक गोड कंद.
**हस्तिकन्दः** (रा. ७.३५; पृ. ३५०)
अति मोठा कंद.

**–कन्दक**–पु., **वनस्पति० सूरणः**
(रापरि. ७.५; पृ. १६९)
सूरण.

**–काच**–पु., **मणि० स्थूलाकारः काचः** (सुउ. ७.२८)
मोठ्या आकाराची काच. एक मणी.

**–कुमुद**–पु., **वनस्पति० करवीरः**
(रा. १०.३; पृ.१३४)
कण्हेर.

**–गुद**–न., **शारीर० त्रिवलीरूपं स्थूलगुदम् पुरीषवहानां स्रोतसां मूलम्** (चवि. ५.८)
तीन वळ्यांनी युक्त मोठे गुद, मळवाहक स्रोतसांचे मूळ.

**–चञ्चु**–स्त्री., **वनस्पति० बृहच्चञ्चुः**
(रापरि. ४.२०; पृ. ३३६)
एरंडवर्गातील एक वनस्पती.

**–जीरक**–पु., **वनस्पति० उपकुञ्ची**
(ध. २.५९; पृ. ८१)
काळे जिरे.

**–तण्डुल**–पु., **धान्य० स्थूलशालिः द्र० 'शालि'**
(रा. १६.९०; पृ. २२१)
जाड तांदूळ.

**–तण्डूलसंभूत**–पु., **धान्य० व्रीहिः**
(रा. १६,१२०; पृ. २२२)
तांदळाचा एक प्रकार. जाड तांदूळ.

**–ताल**–पु., **वनस्पति० हिन्तालः**
(रा. ९.९७; पृ. १८२)
शिंदी.

**–त्वचा**–स्त्री., **वनस्पति० काश्मरी**
(रा. ९.१४८ पृ. २९)
शिवण.

**–दण्ड**–पु., **वनस्पति० महानलः**
(ध. ४.१४२; पृ. १६२)
मोठा देवनळ.

**–दर्भ**–पु., **वनस्पति० मुञ्जः** (रा. ४.१३२; पृ. १६०)
मुंज, मोळ.

**–दला**–स्त्री., **वनस्पति० कुमारी**
(रापरि. ५.१२; पृ. ३४०)
कोरफड.

**–नकुल**–पु., **प्राणि० नकुलभेदः द्र० 'नकुल'**
(चचि. ८.१५२ पृ. ८.१५२)
मुंगुसप्रकार.

**–नाल**–पु., **वनस्पति० महानलः**
(ध. ४. १४२; पृ. १६२)
मोठा देवनळ.

**–नेत्र**–न., **बस्तिनेत्रदोष० अस्मिन् दुर्ग्रहता कर्षणश्च दोषौ भवतः** (चसि. ५.४-७)
बस्तियंत्राची नळी मोठी जाड असणे, हा दोष आहे. यामुळे ती गुदात घालणे त्रासदायक होते, तिच्याने गुदद्वार बाहेर आणले जाते.

**–पर्वन्**–वि., **लक्षण० स्थूलग्रन्थिः** (चसू. २१.१५)
स्थूल पेरी असलेला.

**–पुष्पा**–स्त्री., **वनस्पति० झण्डू** (रापरि. ५.५२;
पृ. ३४४)
मोठा झेंडू.

**–प्रियङ्गुक**–पु., **वनस्पति० प्रियङ्गुः** (रा. १६.१४४;
पृ. २२६)
गव्हला.

**–फल**–पु., **वनस्पति० शाल्मली** (रा. ८.२१२;
पृ. १९५)
सावरी.

**(-फला)**–स्त्री., वनस्पति० शणपुष्पी (रा. ४.२९८; पृ. ४८)
रानताग. सण.

**-फेनिल**–वि., अतीवफेनयुक्तम् (असंसू. ६.२२) अतिशय फेसाळ. अति फेसयुक्त.

**-मरिच**–न., वनस्पति० कक्कोलम् (रा. १२.६९; पृ. १०२)
कंकोळ.

**-मल**–पु., पुरीषमूत्रादयः (असंशा. २.३४)
विष्ठा, मूत्र इत्यादी मळ.

**-मूल**–वि., मूलप्रदेशे स्थूलम् (हे. अहसू. ११.११)
मुळात जाड, जाड मुळाचा.
न., वनस्पति० चाणाख्यमूलम् (रा. ७.५३, पृ. १४१)
मोठे मूळ व मोठा कंद असलेली बरड जमिनीत होणारी वनस्पती.

**-रुहा**–स्त्री., वनस्पति० पद्मिनी (रा. ५.१३१; पृ. १५२)
सुगंधी जाड मुळाची पाण्यात होणारी सुंदर फुलांची वनस्पती.

**-लक्ष्य**–वि., दानशौण्डः (असंशा. ८.१६)
दानशूर, दाता, उदार.

**-वल्कल**–पु., वनस्पति० पट्टिकालोध्रः द्र० लोध्र. (ध. ३.१७७; . १२९)
रोध्राचा एक प्रकार.

**-वैदेही**–स्त्री., वनस्पति० श्रेयसी द्र० चविका. (रा. ६.११८; पृ. ८५)
चवक. मोठी पिंपळी.

**-शर**–पु., वनस्पति० शरः (ध. ४.१३५, पृ. १६१)
शर, बाण गवत.

**-शालि**–स्त्री., धान्य० व्रीहिभेदः द्र० व्रीहि (रा. १६.९०; पृ. २२१)
एक प्रकारचा तांदूळ.

**-शिम्बी**–स्त्री., वनस्पति० असिशिम्बी (रा परि. ७.९७ पृ. ३५५)
तलवारीसारखी मोठी शेंग असलेली वनस्पती.
वनस्पति० निष्पावः (रा. १६.१७५. पृ. २३०)
पांढऱ्या मोठ्या पावट्याची शेंग.

**-शीर्षा**–स्त्री., कीट० पिपीलिकाभेदः, तद्दष्टलक्षणम् श्वयथुरग्निस्पर्शवद्दाहशोफौ भवतः द्र० पिपीलिका? (सुक. ८.३४)
मुंगीच्या जातीचा एक किडा. तो डसला असता सूज व ठिणगी लागल्यासारखी आग.

**-सायकमुखाख्य**–पु., वनस्पति० स्थूलशरः- (रा. ८.२१२ पृ. १६१)
जाड मोठे बाण गवत.

**-स्कन्ध**–पु., वनस्पति० लकुचः (रा परि. ९.४४ पृ. ३६७)
छोटा फणस.

**-स्रोतस्**–न., स्थूलमुखम् स्रोतोविशेषः (चक. १.५)
मोठ्या तोंडाचे स्रोतस.

**स्थूलक**–पु., वनस्पति० गन्धपलाशः (ध. १.६४; पृ. १९)
एक प्रकारचा कचोरा.

**-हित**–वि., स्थूले स्थूलाय वा हितकरम् (असंसू. ६.११७)
लठ्ठ मनुष्याला-लठ्ठपणी हितकारक.

**स्थूलाक्ष**–वि., विस्फारितनेत्रः (सुउ. ६०.१६)
मोठ्या डोळ्याचा, पसरट डोळ्याचा.

**स्थूलाङ्ग**–पु., धान्य० स्थूलशालिः द्र० 'व्रीहि' (रा. १६.९० पृ. २२१)
जाड भात, जाड साळ.

**स्थूलादिकन्दवर्ग**–पु., द्रव्यगण० स्थूलसूरणमाणकप्रभृतयः कन्दाः, तेषां सामान्यगुणाः–ईषत्कषायाः, कटुका रूक्षा विष्टम्भिनो गुरवः, कफवातलाः पित्तहराश्च (सुसू. ४६.३०६)
स्थूलकंद, मोठा सूरण कंद, माणककंद इत्यादी कंद. गुण— थोडे तुरट, तिखट, रूक्ष, अवष्टंभक, जड, पित्तनाशक, कफवातवर्धक.

**स्थूलान्त्र**–न., शारीर० बृहदन्त्रम्, पञ्चदशकोष्ठाङ्गेष्वेकम् (चशा. ७.१०; सुनि. १२.६) तदायामः–सार्धत्रिव्यामान्यन्त्राणि पुंसां, स्त्रीणामर्धव्यामहीनानि (सुशा. ५.९) कव्यन्त्रम्, गुदान्त्रम्, (सुनि. २.५) पुरीषवहानां स्रोतसां मूलम्–पक्वाशयः (चवि. ५.८)
मोठे आतडे. कोठ्याच्या पंधरा अंगांपैकी एक. साडेतीन वाव पुरुषाचे, तीन वाव स्त्रीचे आतडे असते. कंबरेतील आतडे, (पक्वाधान) गुदाचे आतडे. विष्ठावाहक स्रोतसाचे मूळ (पक्वाशय).

**स्थूलान्त्रप्रतिबद्धा**–स्त्री., शारीर० धमनी० ( असंशा. ६.३२ )
मोठ्या आतड्याशी बद्ध झालेली (धमनी).

**स्थूलाम्र**–पु., वनस्पति० आम्रः ( रा. ११.९, पृ. १७१ )
आंबा, मोठा आंबा.

**स्थूलारुष्क**–न.,रोग० क्षुद्रकुष्ठ० सन्धिषु स्थूलमूलान्यतिदारुणानि कठिनान्यरूंषि व्रणाः स्युः (सुनि.५.९)
कुष्ठाचा प्रकार. मुळात जाड, अतिभयंकर व कठिण असलेले खवडे, यांचे व्रण होतात.

**स्थूलास्या**-स्त्री., वनस्पति० गन्धपलाशः ( रा. ६.८९; पृ. १९ )
एक प्रकारचा कचोरा.

**स्थूलैरण्ड**–पु., वनस्पति० एरण्डः ( रा. ८.४४९; पृ. ६८ )
मोठा एरंड.

**स्थूलैला**–स्त्री., वनस्पति० एलाभेदः, द्र० 'एला' ( धनि. २.४६; पृ. ७८ )
वेलदोडाप्रकार. मोठा वेलदोडा.

**स्थेमन्**–पु., स्थैर्यम् ( असंसू. २०.३ )
स्थैर्य, स्थिरत्व,

**स्थैर्य**–न., अचलत्वम्, स्थिरता ( सुसू. ४१.४(१))
काठिन्यम् ( सुसू. १७.५ )
स्थिरता, अचलत्व, अढळपणा, कठिणपणा. कठिनता.
स्तम्भः ( ड. सुसू. १५.१३ )
थांबणे, स्थिर होणे, गति थांबणे.
वयःस्थापनकारित्वम् ( सुसू. ४६.४१-४२ )
तारुण्य कायम ठेवण्याचा गुण.

**-कर**–वि., स्थिरतां दृढतां च कुर्वाणः ( मधुररसः ) ( चसू. २६.४३(१))
स्थिरता, बळकटपणा करणारा. ( मधुररस ).

**-कृत्**–वि., देहदार्ढ्यकृत् ( हे. असंसू. ६.६० )
शरीर बळकट करणारे.

**स्थैर्यक**–पु., कीट० श्लेष्मप्रकोपणः ( असंउ. ४३ )
एक किडा, कफाचा प्रकोप करणारा.

**स्थौणेय**–न., वनस्पति० ग्रन्थिपर्णिकम् ( ड. सुक. ६.१४–२७; असंउ. ४० ) तद्गुणाः-- कटु, तिक्तमुष्णं ( चचि. ३.२६७ ). सुगन्धि, बलदं, पुष्टिदं, त्रिदोषघ्नम् (ध.३.७०; पृ. ११०)
हिं.–थुनेर.
म.—**थुणेर**.
गु.—भरुण्ठ.
बं.—गान्थि आला.
गंठीवन, गठीना. एक सुगंधी द्रव्य. **गुण**—तिखट, कडु, उष्ण, सुगंधी, बलदायक, पौष्टिक, तिन्ही दोष नाशक.

**स्थौणेयक**–न., वनस्पति०स्थौणेयम् सुगन्धिद्रव्यविशेषः ( चचि. ३.२६७; चक. १.२३; सुसू. ३८.२४-२५ ध. ६९, पृ. १०९)
गंठीवन, गठोना. एक सुगंधी द्रव्य.

**स्थौल्य**–न., स्थूलस्य भावः स्थूलता लक्षण० (चसू. १६.१३) उपचितशरीरत्वम् (सुसू. १५.३२)
स्थूलता, जाडी, लठ्ठपणा, भरलेले शरीर असणे. शरिराचा भरीवपणा.
रोग० अतिस्थौल्यम्, द्र० 'मेदोरोग' ( चसू. २१.३ )
अतिलठ्ठपणा, अतिमेदस्वी.

**स्नपन**–न., स्नानम् ( असंसू. ८; असंउ. २ )
स्नान
उपक्रम० शोधनम् ( र. ३०.५६ )
एक उपचार. शुद्धि करणे, वमन विरेचन इ० देऊन वांती रेच इत्यादी करविणे.
विनिक्षेपः । निर्वापः ( र. ८.५६ )
तापलेली धातु काढा, पाणी इत्यादीमध्ये बुडविणे.

**स्नातशिरस्**-वि., स्नातं परिषिक्तं शिरो येन सः ( चसि. २.२१ )
डोके धुतलेला, डोक्यावरून स्नान केलेला.
स्नान करून उटणे लावलेला.

**स्नातानुलिप्त**-वि., पूर्वं स्नातः पश्चादनुलिप्तः ( चइ. १२.५ )
स्नान करून उटणे लावलेला.

**स्नातुकाम**–वि., स्नातुमिच्छति यः ( चसि. २.२० )
स्नान करू इच्छिणारा.

**स्नान**–न., जलेन शरीरस्य मार्जनम् ( चसि. ५.९४ )
स्नानं श्रमहराणां श्रेष्ठम् ( चसू. २५.४०; असंसू. १३ ) स्नानमोजस्करं परम् ( चसू. ५.९४ )
स्नानगुणकर्म–निद्रादाहश्रमस्वेदकण्डूतृषाहरं मलहरं हृद्यं सर्वेन्द्रियविशोधनं तन्द्रापापशमनं

तुष्टिदं पुंस्त्ववर्धनं रक्तप्रसादनमग्नेश्च दीपनम् (सुचि. २४.५८) आयुष्यम् (अहसू.२.१६) स्नाना-ऽयोग्याः-अतिसार- ज्वर-कर्णशूल-वातरोगपीडितेषु तथा आध्माताऽरोचकाऽजीर्णभोजनेषु च सत्सुस्नानं गर्हितम्। तरुणज्वरे तथा विगतज्वरेऽपि स्नान-निषेधो यावत्प्रकृतिस्थो न भवति ( सुउ. ३९.१६०-(सुचि. २४.६२, अहसू. २.१८ ) शीतजलेनोष्ण-जलेन वा स्नानं क्रियते तत्राऽधःकायस्योष्णजलेन स्नानं बलावहम्। उत्तमाङ्गस्य शीतजलेन स्नानं केश्यं चक्षुष्यं च भवति ( अहसू. २.१७ ) जात-मात्रस्य स्नानार्थं सिद्धजलप्रकारः- क्षीरिवृक्षकषायः, सर्व-गन्धोदकं रूप्यहेमप्रतप्तं वारि कपित्थपत्रकषायो वा इत्येतद्युक्तेन कोष्णेन सिद्धजलेन कालं दोषं विभवं च लक्षयित्वा स्नापयेत् (सुशा. १०.१३)

स्नान. पाण्याने शरीर स्वच्छ करणे. अंग धुणे. श्रमहरण करणाऱ्यात श्रेष्ठ व अतिशय ओजस्कर. **गुणकर्मे**-झोप, आग, श्रम, घाम, खाज, तहान, मळहारक, सर्व इंद्रिये शुद्ध करणारे, तंद्रानाशक. पापनाशक, संतोषदायक, हृदयाला हितकर पुरुषत्ववर्धक, रक्तदोष शुद्ध करणारे, अग्नि-दीपक व आयुष्यवर्धक आहे. **स्नानाला अयोग्य**-अतिसार, ज्वर, कानातला शूल, वातरोगानी पीडित,पोटफुगी,अरुची, अजीर्ण झालेले असून भोजन केलेले यांनी स्नान करू नये. नवज्वरी, ज्वर गेलेले यांनी जो पर्यंत शक्ती भरून येत नाही तो पर्यंत स्नान वर्ज्य करावे. थंड किंवा ऊन पाण्याने स्नान करावे; ऊन पाण्याने खांद्यावरून करावे, थंड पाण्याने डोक्यावरून करावे म्हणजे ते बलावह होते. डोक्यावरून थंड पाणी केसांना डोळ्यांना बलकर. नवजात बालकाला वड, उंबर इत्यादी दुधाळ वनस्पतींच्या काढ्याने. सुगंधी वनस्पतींच्या काढयाने कवठाच्या पानांच्या काढ्याने त्यात रुपे सोने तापवून, विझवून कोमट कोमट स्नान घालावे. दोष काल व वैभव यांचा विचार करून करावे.

**अवगाहनम्** ( चसू. २५.४० ) **जलपूर्णकटाहादौ निमज्जनम्** ( सुउ. ३९.१५६ )

पाण्याने भरलेल्या कढई इत्यादीमध्ये बसणे, बुडणे.

**-भू**-स्त्री., **स्नानभूमिः** ( असंसू. ३ )
स्नानाची जागा.

**-भूमि**-स्त्री., **स्नानार्थं भूमिः** ( चसू. १५.६ )
स्नानाची जागा.
वि., **स्नानार्थं कृतं गृहम् स्नानस्य भूमिः स्थानं यस्मिन् तद्** ( **सूतिकागारम्** ) ( चशा. ८.३३ )
स्नानाची खोली असलेले बाळंतिणीचे घर.

**स्नापक**-वि., **यो रुग्णं स्नापयति, सः। स्नापनोपयुक्तः परिचारकः** ( चसू. १५.७ )
जो रोग्याला स्नान घालतो तो. स्नान घालणारा परिचारक.

**स्नायु**-स्त्री., **शारीरभाव०मेदस उपधातुः, पितृजो भाव०** (चशा. ३.७) '**मेदसः स्नायुसम्भवः**' (चचि.१५) '**मेदसः स्नेहमादाय वायुः स्नायुत्वमाप्नुयात्**', **अस्मिन् कर्मणि स्नायूनां खरपाकोऽस्ति** ( सुशा. ४.३०; चशा. ७.१४ ) **मांसवहानां स्रोतसां स्नायु-मूलम्** ( चवि. ५.८ )
स्नायु. एक शरीर घटक. मेदाचा उपधातु. पित्याचा अंश. मेदापासून त्याचा स्नेह घेऊन वायु स्नायु होतो. मेद व वायु यांचा स्नायु होताना जे पचन होते त्यात होणारा पाक खर-कठिण पाक होतो. मांसवाहक स्रोतसाचे स्नायु हे मूळ आहे.
**शारीर० शणाकारोऽवयव०** (सुसू. २५.२०-२१) **स्नायुसंख्या-नवस्नायुशतानि, तासां शाखासु षट्-शतानि, द्वे शते त्रिंशच्च कोष्ठे, ग्रीवां प्रत्यूर्ध्वं सप्ततिः। एकैकस्यां तु पादाङ्गुल्यां षट् निचिताः, तास्त्रिंशत्, तावत्य एव तलकूर्चगुल्फेषु तावत्य एव जङ्घा-याम्, दश जानुनि, चत्वारिंशत् ऊरौ, दश वङ्क्षणे, शतमध्यर्धमेवमेकस्मिन् सक्थ्नि भवन्ति, एतेनेतर-सक्थि बाहू च व्याख्यातौ, षष्टिः कट्यां, पृष्ठे-ऽशीतिः, पार्श्वयोः षष्टिः, उरसि त्रिंशत्, षट्त्रिंशद् ग्रीवायां, मूर्ध्नि चतुस्त्रिंशत्, एवं नवस्नायुशतानि व्याख्यातानि** ( सुशा. ५.२९) **स्नायुप्रकाराः-प्रतानवत्यः वृत्ताः पृथ्व्यः शुषिराश्चेति चतुर्विधाः स्नायवः, तत्र वृत्ताः स्नायवः कण्डरा इति विज्ञेयाः। आमपक्वाशयान्तेषु बस्तौ च शुषिराः स्नायवः। पार्श्वोरसि, तथा पृष्ठे शिरसि च पृथुलाः स्नायवः। स्नायुकर्म-फलकास्तीर्णा बहुभिः बन्धनैर्युता नृयुक्ता सुसमाहिता नौर्यथा अप्सु भारक्षमा भवेत्; एवं अस्मिन् शरीरे यावन्तः सन्धयः, ते बहुभिः स्नायुभिः बद्धाः। तेन च नराः भारसहाः भवन्ति। व्यापा-दिता स्नायुः यथा शरीरिणं हन्यात् न तथा अस्थीनि**

पेश्यः सिराः सन्धयो वा व्यापादिताः शरीरिणं हन्युः इति स्नायूनां महत्त्वं विद्यात् ( सुशा. ५.२९-३५ ) तत्र महत्यः स्नायवः कण्डराः स्मृताः ( भा. प्र. ) ताः षोडश, तासां चतस्रः पादयोः, तावत्यः हस्तग्रीवापृष्ठेषु, तत्र हस्तपादगतानां कण्डराणां नखाः ( अग्र ) प्ररोहाः, ग्रीवाहृदयनिबन्धिनीनाम् अधोभागगतानां मेढ्रम्, श्रोणिपृष्ठनिबन्धिनीनाम् अधोभागगतानां बिम्बम्, मूर्धोरुवक्षोंऽसपिण्डादीनां च ( सुशा. ५.११ ) प्रसारणाकुञ्चनयोरङ्गानां कण्डरा मताः ( शार्ङ्ग. ) कूर्चाः पुनः मांसास्थिसिरास्नायूनां जालकप्रभवाणां सन्ततिविरचिताः ( ड. सुशा. ५.१३ ) षट् कूर्चाः ते हस्तपादग्रीवामेढ्रेषु, हस्तयोर्द्वौ, पादयोर्द्वौ, ग्रीवामेढ्रयोरेकैकः ( सुशा. ५.१३ ) महत्यो मांसरज्जवश्चतस्रः, पृष्ठवंशमुभयतः पेशीनिबन्धनार्थं द्वे बाह्ये, आभ्यन्तरे च द्वे ( सुशा. ५.१४ ) मांसस्नायुजालानि चत्वारि, तानि मणिबन्धगुल्फसंश्रितानि, परस्परनिबद्धानि परस्परसंश्लिष्टानि, परस्परगवाक्षितानि चेति यैर्गवाक्षितमिदं शरीरम् (सुशा. ५.१२) स्नायुविकाराः- वेगवान् अनिलः स्नायुप्रतानम् आक्षिपति, तदा मानवः अभ्यंतरं धनुरिव नमति, एष अन्तरायामः। यदा तु वायुः बाह्यस्नायुप्रतानस्थो भवति, तदा बाह्यायामं करोति, इत्येष बहिरायामः। स्नायुप्राप्तश्च वातः स्तम्भकम्पौ शूलमाक्षेपणं च करोति

( सुनि. १.५५-५६ )

स्नायुविद्धपुरुषलक्षणानि- कौब्ज्यं, शरीरावयवसादः, क्रियास्वशक्तिः तुमुला रुजा, तथैव व्रणस्य चिराद्रोहणम् ( सुसू. २५ )

सणासारखा तागासारखा अवयव. एकंदर नउशे स्नायु आहेत. शाखात ६०० कोष्ठात २३० मानेच्या वर ७० एक एका पायाच्या अंगुलीमध्ये ६ मिळून ३० तितकेच पायाचा तळवा, पायाचा मधला भाग आणि घोटा यात. तितकेच पोटरीत, गुडघ्यात दहा, उरःस्थानात ४० जांघेत १० याप्रमाणे एका तंगडीत एकूण १५० होतात. याप्रमाणे शाखांमध्ये म्हणजे २ हात, २ पाय मिळून ६शे संख्या होते, ६० कमरेत, ८० पाठीत, ६० बरगड्यात, ३० उरामध्ये, ३६ मानेत, ३४ डोक्यात असे ३ शे. मिळून सर्व ९शे स्नायु होतात. प्रकार चार. (१) तंतुमय, लांबट (२) वाटोळे (कंडरा) (३) पसरट (४) पोकळ. यांपैकी आमाशय, पक्वाशय व त्यांचे शेवटी तसेच बस्तीत पोकळ आणि फासळ्या, छाती, पाठ, डोके यांवर विस्तृत स्नायु असतात. नावेच्या फळ्या जशा बंधनाने बांधल्याने ती माणसांसह पाण्यात भारवाहनाला योग्य होते तसेच शरिरात संधी अनेक स्नायूंनी बांधल्यामुळे मनुष्य भार वाहण्यास समर्थ होतो. **स्नायूंचे महत्व—** हाडे, पेशी, शिरा, संधि, विकल झाले असता जो शरिराला त्रास होतो यापेक्षा स्नायु विकल झाले असता अधिक त्रास होतो. मोठे स्नायु कंडरा होत. त्या १६. पायांत चार, तितक्याच हात मान व पाठीत आहेत. हातापायातील कंडरांचे अंकुर नखे होत व मान, हृदय यांच्या खाली जाणाऱ्या कंडरांचे अंकुर शिश्न होय. पाठ, कंबर बांधणाऱ्या व खाली जाणाऱ्या कंडरांचे गोल आकाराचे अवयव ढुंगण; व पायाच्यावर जाणाऱ्याचे, छाती स्तन, पाठीच्या वर जाणाऱ्यांचे अंसपिंड-खांदे व हातातून वर जाणाऱ्या कंडरांचे अग्र डोके होय. कंडरांनी अवयवांचे प्रसरण व आकुंचन होते मांस, अस्थि, शिरा व स्नायूच्या जाळ्यांपासून **कूर्चा** होतात. त्या सहा. हातात २ पायात २ मान व शिश्न यात एकेक. मोठ्या मांसाच्या दोऱ्या चार. पाठीच्या कण्याच्या दोन्ही बाजूस, पेशी बांधण्याकरिता आत दोन व बाहेर दोन. मांस स्नायूच्या जाळी ४. मनगट व घोटा यात एकेक. ती परस्परात बांधलेली, चिकटलेली व मध्ये जाळ्याच्या छिद्रासारखी छिद्रे असलेली. त्यांनीच हे छिद्रमय शरीर म्हटले जाते. **स्नायुविकार–** आतला धनुर्वात. जेव्हा वेगयुक्त वात आतल्या स्नायूंचे ताणे आतल्या बाजूस फेकतो तेव्हा आंतला व बाहेरच्या स्नायूचे तंतू बाहेरच्या बाजूस फेकले जातात तेव्हा बाह्य धनुर्वात म्हणतात. तसेच स्नायुगत वात स्नायु जखडणे, कंप, शूल, आचके करतो. **स्नायु कापला गेला तर**–कुबडेपणा, अवयव गळणे, क्रिया करण्याची असमर्थता, अतिशय वेदना, तसेच जखम दीर्घ काळाने भरणे ही लक्षणे होतात.

**–कोथ**–पु., स्नायवःकोथः। व्रणे यदा शटिता स्नायुर्भवति, तदा तस्यास्तत्र छेदनं कर्तव्यम्

( सुचि. १.३४ )

स्नायूची कूज. जेव्हा व्रणात स्नायू कुजतो तेव्हा तो कापून काढावा.

**छेद्यरोग० स्नाय्वाः पूतिभावः** ( सुसू. २५.३-५ )
स्नायूचा कापण्यास योग्य रोग. स्नायूची कूज.

**–क्लेद**–पु., लक्षण० **स्नाय्वाः क्लेदः। तेन व्रणस्य कृच्छ्रत्वं जायते** ( चचि. २५.३१-३५ )
स्नायूचा स्राव, याने व्रण कष्टसाध्य होतो.

**–जाल**–न., शारीर० **स्नायूनां जालम्। देहे स्नायुजालानि चत्वारि। एकैकमेकस्मिन्मणिबन्धे गुल्फे च** (सुशा. ५.१२) **स्नायुजालगतशल्येनाऽऽक्षेपकादीनि लक्षणानि भवन्ति** (अहसू. २८.५)
स्नायूंचे जाळे. ही चार. प्रत्येक मनगट व घोटा यांत. स्नायूंच्या जाळ्यात शल्य रुतले तर आचके इत्यादी लक्षणे होतात.

**–जालोत्क्षेपण**–न., लक्षण० **स्नायुगतशल्ये स्नायुसमूहस्योर्ध्वं नयनम्** (सुसू. २६.१०)
स्नायुगत शल्यात स्नायूचे जाळे वर उचलून येणे.

**–त्व**– न., **स्नायुभावः। स्नायुस्वरूपम्** (सुशा. ४.२९)
स्नायुपणा, स्नायूचे स्वरूप.

**–दग्ध**–न., दाह० **अग्निकर्म०** लक्षणम्– **कृष्णोन्नत व्रणता। स्रावस्य संनिरोधश्च** (सुसू. १२.८; असंसू. ४०)
डागाचा प्रकार. स्नायूवर डाग हे एक कर्म. स्नायु जाळणे. **लक्षण**– काळा व वर उचलून आलेला व्रण, स्राव अडणे.

**–प्रतान**–पु., **स्नायुविस्तारः। लतावदनेकप्ररोहं स्नायुजालम्** (सुनि. १.५७)
स्नायु तंतु, स्नायूचा विस्तार. वेलीप्रमाणे अनेक अंकुर असलेले स्नायूचे जाळे.

**–मर्मन्**–न., शारीर० **स्नायुबहुलं मर्म** (सुशा. ६.३) **संख्या–सप्तविंशतिः स्नायुमर्माणि** ( सुशा. ६.४) **आण्यश्चतस्रः, द्वौ विटपौ द्वौ कक्षधरौ, चत्वारः कूर्चाः चत्वारि कूर्चशिरांसि, एको बस्तिः चत्वारि क्षिप्राणि, द्वौंसौ द्वे विधुरे, द्वावुत्क्षेपौ एवं सप्तविंशतिः स्नायुमर्माणि** ( ड. सुशा. ६.७; असंशा. ७ ) **द्र० मर्म**
स्नायु मर्म. स्नायु हे ज्यात सिरादिकांच्या मानाने जास्त आहेत असे मर्म. ही २७. आणी मर्म ४ विटपमर्म २ कक्षधरमर्म २ कूर्चमर्म ४ कूर्चशिर मर्म ४ बस्तिमर्म १ क्षिप्रमर्म ४ अंसमर्म २ विधुरमर्म २ उत्क्षेपमर्म २.

**–महारुज्**–वि., **स्नायुषु महती पीडा यस्य सः। स वसास्नेहयोग्यः** ( चसू. १३.४८ )
ज्याच्या स्नायूंमध्ये मोठी पीडा होते तो. त्याला वसास्नेह देणे योग्य.

**–विद्ध**–न., रोग० **लक्षणम्-कौब्ज्यम् शरीरावयवसादः क्रियास्वशक्तिस्तुमुला रुजश्चिरं व्रणरोहणं च** ( सुसू. ३५.२७ )
स्नायु कापलेला–विकल असणे. एक रोग. कुबडेपणा शरिराचा तो अवयव गळणे, त्या अवयवाची क्रिया होऊ न शकणे, अतिशय वेदना व व्रण भरून येण्यास फार काळ लागणे.

**–संकोच**–पु., रोगलक्षण० **स्नायूनां संकोचनम्** ( चसू. ५.९२ ) **स्नायूनां स्तम्भनम्** ( अहसू. १७.२० )
स्नायूंचा संकोच. स्नायु आखूड होणे. स्नायु जखडणे, ताठरणे.

**स्नायुक**–न., रोग० **शाखासु कुपितो दोषो विसर्पवच्छोथं कृत्वा तत्क्षते भिनत्ति। उष्मयुक्तश्च दोषः स्नायुं विशोष्य तन्तुनिभं श्वेतद्युतिकं वृत्तं जीवं कुर्यात्। स च जीवः शनैः शनैःक्षताद् बहिर्याति। छेदाच्च कोपमुपैति। तस्य पातेन शोथशान्तिर्भवति। किन्तु पुनः सोऽन्यस्मिन् स्थाने सम्भवति। संख्यासम्प्राप्तिः–अयमष्टधा वातेन श्यावरूक्षः सरुक् स्यात्। पित्तान्नीलपीतः सदाहः स्यात्। श्लेष्मणा श्वेतः स्यात्। द्विदोषेण असौ द्विदोषलिङ्गी। सन्निपातेन सर्वलिङ्गः। रक्तेनाऽरक्तकान्तिरित्यष्टविधः,**
**उपद्रवाः– यदि बाह्वोर्जङ्घयोः स्नायुकस्तन्तुकीटः त्रुट्यते, तदा खञ्जता बाहुसंकोचावुत्पद्येयाताम्** ( मानि. परि ) **चिकित्सा विसर्परोगवदत्र चिकित्सा** ( मानि. ) **स्नेहस्वेदप्रलेपादि कर्म यथोचितं कुर्यात्** ( भाप्र ) **कुम्भीपुष्पाणि भक्षयेत्** ( र. २५.५४ )
नारू. उष्णयुक्त दोष स्नायु घटक सुकवून तंतु सारखा पांढरा दिसणारा वाटोळा जीव करतो. शाखेत दोष कुपित करून धावऱ्यासारखी सूज करतो. नंतर व्रण होतो. त्या जखमेतून तंतूसारखा तो जीव हळू हळू बाहेर येतो. तो तुटला तर सूज इत्यादी वाढतात. तो संपूर्ण बाहेर पडला

तर सूज नाहीशी होते. परंतु पुन्हा दुसरीकडे तो होतो. **संख्यासंप्राप्ती**–प्रकार आठ (१) **वाताने** काळसर रूक्ष व वेदनायुक्त (२) **पित्ताने** निळसर पिवळे आंग करतो. (३) **कफाने** पांढरा खाज असते. दोन दोषांनी त्या दोन्ही दोषांची मिश्र चिन्हे होतात. (४) त्रिदोषजात तिन्ही दोषांची चिन्हे असतात. (५) रक्ताने तांबड्या रंगाचा नारू असतो. उपद्रव– जेव्हा बाहू किंवा पिंडऱ्याच्या स्नायूमधला किडा तुटतो तेव्हा तो अवयव विकल होतो व मनुष्य थोटा लंगडा, असा होतो. उपचार–धावऱ्याचे उपचार करावेत. स्नेह, घाम, लेप इत्यादी योग्य उपाय योजावे. कुंभीची फुले खावीत.

**स्नाय्वर्मन्**–न., **नेत्ररोग० नेत्रशुक्लभागगतो रोगः। लक्षणम्–नेत्रस्य शुक्लभागे खरं प्रपाण्डुपिशितं यद्वृद्धिमुपैति तत्स्नाय्वर्म, प्रस्तारिणोऽर्मणः स्रावं निरुणद्धि यदाऽनिलः। विना स्रावं विशुष्कं तत्स्नाय्वर्मेति प्रकीर्तितम्। निमिवचनम्** (मानि-) (सु उ. ४.६ **साध्यरोगोयम्**) सुउ. १.४० ) **चिकित्सा–लेखनाञ्जनैरेवोपाचरणीयम्** ( सुउ.१५.१७ )

डोळ्याच्या स्नायूचा एक रोग. डोळ्याच्या पांढऱ्या कवडीचा रोग. पांढऱ्या भागावर खरखरीत फार पांढरे मांस वाढते तो. प्रस्तारि अर्म या रोगाचा स्राव जेव्हा वायु अडवतो तेव्हा स्रावरहित सुकट असे अर्म होते तो स्नाय्वर्म रोग. हा असाध्य असतो. उपचार–खरडून काढणे, अंजन करणे.

**स्नाय्वामय**–पु., **स्नायूनां रोगः** ( चचि. २९.३९ )
स्नायूंचा रोग.

**स्नाव**–न., शारीर० **स्नायुः** ( असंशा. ५ )
स्नायु.

**–बन्धन**–न., **स्नायुनिबन्धनम्** ( असंशा. ५ )
स्नायूंचे बंधन.

**–मर्मन्**–न., **स्नायुमर्मन्** ( असंशा. ७ )
स्नायूच्या आधिक्याचे मर्म.

**स्नावार्मन्**–न., **नेत्ररोग० स्नाय्वर्म** ( असंउ. १३ )
डोळ्याच्या स्नायूचा–पांढऱ्या कवडीचा रोग.

**स्निग्ध**–पु., **गुण० असौ त्वगिन्द्रियग्राह्यः चक्षुरिन्द्रियग्राह्यश्च**(चशा. ६.१०) **रूक्षविपरीतः** (चसू. १.६१) **चिक्कणः** ( सुसू. ३६.३ ) **विंशतिद्रव्यगुणेष्वेकः** ( अहसू. १.१८ ) **आप्यद्रव्यगुण०** ( सुसू. ४१.४(२) ) **तस्य कर्म–क्लेदने शक्तिः** ( अहसू. १.१८ ) **वातहरं श्लेष्मकारि वृष्यं च** ( चशा. ६.१० ) **स्निग्धगुणः स्नेहकृन्मार्दवकृद्बल-वर्णकरश्च** ( सुसू. ४६.५१६ )
तेल, तूप इत्यादी द्रव्यांचा मुख्य गुण, रूक्ष गुणाच्या विपरीत–उलट स्वभावाचा, स्निग्ध. हा स्पर्शाला समजतो तसाच डोळ्यांना दिसतो. चिक्कण–द्रव्याच्या वीस गुणांपैकी एक. जलीय द्रव्याचा हा एक गुण. क्लिन्न करणे हे कर्म. हा स्नेह मृदुत्व करून वात-नाशन, कफ, शुक्र, बल, व वर्ण करतो.

वि., **प्रीतियुक्तः** ( सुसू. ३४.२४ ) **मित्रभावयुक्तः** ( सुक. १.८-११ )
प्रीतियुक्त, प्रेमळ, प्रेमी, सहानुभूतियुक्त. मित्र-भाव युक्त.

पु., **वनस्पति० एरण्डभेदः, रक्तैरण्डः** ( रा. ८.४४७ पृ. ६८ )
एरंडाचा प्रकार, तांबडा एरंड.

**सरलः** (रा. १२.१३६; पृ. १११) सरळ. देवदार.

न., **खनिजद्रव्य० सुवर्णगैरिकम्** ( ध. ३.१७०; पृ. १२८ )
सोनकाव, सोनगेरू.

**भैषज्य० सिक्थकम्** ( रा. १३.१७४; पृ. ११८)
मेण.

**वनस्पति० जवादि** ( रापरि. १२.६; पृ.३७५ )
प्राणिज सुगंधी द्रव्य. कस्तुरी.

**( स्निग्धा )**–स्त्री., **वनस्पति० मेदा** ( रा. ५.१६१; पृ. ३१ )
मेदा, अष्टवर्गांपैकी एक.

**–च्छवि**–वि., **लक्ष० स्निग्धकान्तिः (बलासप्रकृतिर्नरः)** ( सुशा. ४.७४ )
स्निग्ध कांती. कफ प्रकृतीचा मनुष्य.

**–तण्डुल**–पु., **धान्य० षष्टिकः** ( रा.१६.८४;पृ. २२० )
साठे तांदूळ.

**–तनु**–वि., **स्निग्धा तनुर्यस्य सः** ( अहसू. २७.१८ )
स्निग्ध शरिराचा.

**–दल**–पु., **वनस्पति० गुच्छकरञ्जः** ( रा.९.१८४;पृ. १९१ )
करंज प्रकार, वावळा.

**–दारु**–पु., वनस्पति० देवदारुः
(रा. १२.१०३; पृ. ४१)

देवदार.

**सरलः** ( ध. ३.७८; पृ. १११ ) सरळ देवदार.

**–पत्र**–पु., वनस्पति० घृतकरञ्जः
( रा. ९.१७८, पृ. १९१ )

करंज.

**–पत्रक**–पु., वनस्पति० मज्जरः
( रापरि. ८.५२; पृ. ३६१ )

स्निग्ध पानांचे मऊ गाठीचे चांगले गवत.

**–पत्रा**–स्त्री., वनस्पति० शाक० पालक्यम्
(रापरि. ७.७२; पृ. ३५३ )

पालक.

**–पर्णी**–स्त्री., वनस्पति० स्वादुपत्रफला, पटोलः
( रा. ७.७७; पृ. १७ )

गोडे पडवळ.

मूर्वा ( ध. १.१३; पृ. ९ ) मोरवेल.

**–पिशित**–न., स्निग्धं पिशितम् । मेदुरं मांसम्
( सुचि. १४.४ )

स्निग्ध मांस. मेद–चरबी पुष्कळ असलेले मांस.

**–फला**–स्त्री., वनस्पति० वालुकम्
( रा. ७.२५०; पृ. ४१ )

वालुक.

**–भोजिन्**–वि., स्नेहयुक्तमन्नं भोक्तुं शीलमस्येति
( असंसू. ३ )

स्निग्ध अन्न खाणारा, स्नेहयुक्त अन्न खाणारा.

**–मुख**–वि., स्निग्धप्रान्तम् मेदुराग्रम्
( अहृसू. १९.९४ )

स्निग्ध मुखाचा–स्निग्ध तोंड (टोक) असलेला.

**–मृत्तिका**–स्त्री., मृत्तिका० स्निग्धगुणयुक्ता मृत्तिका
( चक. १.९ )

स्निग्ध माती.

**–राजि**–पु., सर्प० वैकरञ्जः । कृष्णसर्पेण राजिमत्यां वैपरीत्येन वा जायमानः (सुक. ४.३४;५)

सर्पाची एक जात. काळ्या सापाकडून राजिमतीला किंवा या उलट प्रकाराने होणारा सर्प.

**–लक्षण**–न., लक्षण० स्निग्धनरस्य लक्षणम्
(चसू. १३.६)

स्निग्ध माणसाचे लक्षण.

**–व्यायामबलिन्**–वि., स्नेहोपयोगेन व्यायामेन च यस्य बलं सञ्जातम् सः (चसू. २६.१०६)



स्नेहाच्या उपयोगाने व व्यायामाने ज्याचे बल निर्माण झाले तो.

**स्निग्धोष्णोपशय**–वि., यस्मिन्स्निग्धमुष्णं चान्नपानादि उपशेते (असंनि. ५)

ज्याला स्निग्ध, उष्ण अन्न पानादिकांचा रोगशामक आरोग्य वर्धक उपयोग होतो तो.

**स्नुक्**–स्त्री., वनस्पति० स्नुही (ध. १.२३५)

त्रिधारी निवडुंग.

**–क्षीर**- न., स्नुहीक्षीरम् (चचि. १३.१४०)
(असंसू. ११)

त्रिधारी निवडुंगाचे दूध.

**–पयस्**–न., स्नुहीक्षीरम् (चसू. २५.४०)
(असंसू. १३)

त्रिधारी निवडुंगाचे दूध.

**( स्नुगु )**–गण पु., गण० श्वेतपीतदुग्धभेदेन त्रिकोण-काण्डादिभेदेन भिन्ना स्नुही । स्नुही भेदसमूहः
( र. १०.८८ )

निरनिराळ्या निवडुंगाचा गण. पांढरे, पिवळे दूध, त्रिकोणी चौकोनी कांडे इत्यादी प्रकारांनी निरनिराळ्या निवडुंगांचा गण.

**–स्नुही**–स्त्री., वनस्पति० ( ध. १-२३५. पृ. ५५ ) **क्षीरसारवृक्षः** ( असंक. २ ) **अस्याः क्षीरं तीक्ष्ण-विरेचनानां श्रेष्ठम्** ( चसू. २५.४० ) **गुणाः– तिक्ता, उष्णा गुर्वी कफवातघ्नी दुष्टव्रणाश्मरीदाह-कुष्ठप्रमेहघ्नी । अस्याः क्षीरं विषम्, तदाध्मान-गुल्मोदरवातघ्नम्** ( ध. १.२३५; पृ. ५५ )
( नाड ५.२४, शालि. २९८)

हिं.—सेहुण्ड, थोहर, थुहर.

म.—**वई निवडुंग, काटेनिवडुंग, फड्या निवडुंग.**

गु.—थोरदाण्डलियो, कटाली, कण्टालो थोर हाथलो तर धारी, नानो परदेशी.

बं.—मन्सासिज, सिजवृक्ष, मनसागाछ.

ता.—हैकली.

फा.—लादनाम.

निवडुंग– दुधाळ झाड. याचे दूध रेचक; विषारी दूध. त्रिधारी निवडुंगाचे दूध तीव्र विरेचक औषधात श्रेष्ठ. **गुण**– कडु, उष्ण, जड, कफवातघ्न. दुष्टव्रण, मूतखडा, दाह, कुष्ठ, प्रमेहघ्न. हिचे दूध विषारी; ते पोटफुगी, गुल्म, वात, उदर नाशक.

**–काण्ड**–न., वनस्पति० स्नुहीभेदः सेहुण्डयष्टिः "कांड्या निवडुंग", इति लोके, काण्डलवणोत्पादने उपयुक्तम् ( सुचि. ४.३१ )
निवडुंगप्रकार. कांड्यानिवडुंग. कांडलवण नामक मीठ उत्पन्न करण्यास उपयुक्त.

**–क्षीर**–न., स्नुहीदुग्धम्। व्रणशोधनद्रव्येषु घृतेषु च उपयुज्यमानेष्वेकम् ( सुसू. ३७.१६-१७ )
निवडुंगाचे दूध. व्रण शुद्ध करणाऱ्या द्रव्यानी, तूप तयार करण्यास उपयोगात आणावयाचे एक द्रव्य.

**स्नूही**–स्त्री., वनस्पति० स्नुही ( र. २५.११८ )
निवडुंग.

**स्नेह**–पु., गुण० मार्दवकरः गुणः, स्निग्धः (चशा. ६.१५) विंशतिगुणेष्वेकः ( अहृसू. १.१८ ) पृथिव्यम्बुगुणभूयिष्ठो वीर्यसंज्ञको गुणः ( सुसू. ४१.११ )
स्नेह. तेल, तूप इत्यादी. स्निंध गुण मृदुता करणारा आहे. वीस गुणांपैकी एक. पृथिवी व जल यांच्या गुणांच्या आधिक्याचा वीर्य नांवाचा गुण.

**द्रव्य०** घृततैलादिः ( सुचि. ३१.३-४ ) तैलम् ( र. २१.५१ ) तैलादिस्निग्धद्रव्यम् ( चसू. १३.१, अहृसू. ५.३९; अहृसू. १६.२ )
तूप तेल इत्यादी द्रव्ये. तेल. तेल इत्यादी स्निग्ध द्रव्य.

**कर्म०** स्नैग्ध्यम्, स्नेहनम्, श्लेष्मकर्मस्वेकम् ( अहृसू. १२.५३ ) स्नेहनं च अनिलहननं देहमार्दवकरं मलसङ्गनाशनम् ( चसि. २.७ )
उपचारांतील एक कर्म. स्निग्धता, स्नेहन. हे वातनाशक, शरीर मृदु करणारे व मळाचा अवरोध–संचय नाशक. कफाच्या कार्यापैकी एक कार्य.

**उपक्रम०** स्नेहपानम् ( सुचि. १.८; सुचि. १.३१ ) वातोपक्रमेष्वेक उपक्रमः ( सुचि. ४.२३; अहृसू. १३.१ )
एक उपचार. स्नेहपान. स्नेह पिणे. वातावरील उपचारांतील एक.

**शारीरभाव०** देहस्य स्निग्धत्वम् । मेदोधातोः कर्म ( असंसू. १ ) अक्षिविट्त्वचां यः स्नेहः स मज्ज्ञो मलः ( चचि. १५.१९ सुसू. ४६.५२९ )
शरिरातील एक घटक. शरिराचे स्निग्धत्व. मेदोधातूचे कर्म. डोळे विष्ठा व कातडीचा जो स्नेह तो मजेचा मळ.

**प्रीतिः** ( सुनि. १०.२३ ) प्रीति, प्रेम.

स्नेहविधिः, स्नेहनम्, च । स्नेहनं स्नेहद्रव्येण क्रियते । स स्नेहः द्विविधः स्थावरो जङ्गमात्मकश्च । स्थावरात्मकः स्नेहः तैलमतैलं च, जङ्गमात्मकस्तु वसा मज्जा सर्पिरिति ( चवि. ८.१५० ) ते स्नेहाः पुनश्चतुर्विधाः सर्पिस्तैलवसामज्जानः ( चसू. १.८६ ) 'सर्पिर्मज्जा वसा तैलं स्नेहेषु प्रवरं मतम्' (असंसू. २५) जङ्गमेभ्यः स्नेहेषु गव्यं घृतं प्रधानम् । स्थावरेषु च तिलतैलम् ( सुचि. ३१.३-४ ) गुरुलघुत्वम्–घृतात्तैलं गुरु तैलाद्वसा, वसायाश्च मज्जा ( असंसू. २५ ) स्नेहसंज्ञात्रयम्–यमकस्त्रिवृतो महाँश्चेति स्नेहस्य संज्ञात्रयम् । तेन द्वाभ्यां स्नेहाभ्यां यमकः; त्रिभिः स्नेहैस्त्रिवृतः । चतुर्भिर्महास्नेहः, ( अरु. अहृसू. १६.४ ) घृततैलाभ्यां यमकः, घृततैलवसाभिस्त्रिवृतः । घृततैलवसामज्जभिर्महान् ( हे अहृसू. १६.४ ) स्नेह्याः– ये स्वेदार्हाः शोधनार्हा मद्यासक्ताः स्त्र्यासक्ता व्यायामसक्ताश्च तथा चिन्तकाः वृद्धाः बालाः अबलाः कृशाः रूक्षाः क्षीणरुधिराः क्षीणशुक्राश्च वातपीडिताश्च नेत्राभिष्यन्दिनस्तिमिरिणः कृच्छ्रोन्मीलिनस्ते सर्वेऽपि स्नेह्याः (अहृसू. १६.५-६) रूक्षणानन्तरं प्रयुक्तो यः स्नेहः सोऽसात्म्यतां गतः सन् मलानीरयितुं समर्थो भवति ( असंसू. २५) तेषु अपि घृतपानयोग्याः– धीस्मृत्याद्यभिलाषिणां घृतं पानार्थं शस्यते ( अहृसू. १६.८ ) तैलपानयोग्याः–लाघवदार्ढ्यार्थी तैलं पिबेत् क्रूरकोष्ठेषु तथा ग्रन्थिनाडीकृमिश्लेष्म–मेदो–वातरोगेषु च तैलं पानार्थं हितम् ( अहृसू. १६.९ ) वसापानयोग्याः–पौरुषोपचये व्यायामे च स्नेहपानार्थं वसा इष्यते (चसू. १३.१६) तथा च क्षीणधातुषु अत्यग्निरोगे वातावृतमार्गे च तथा सन्ध्यस्थिमर्मकोष्ठरुजासु, दग्धरुजि आहतरुजि भ्रष्टयोनिरोगे दारुणशिरःशूलयोः विशेषेण स्नेहपानार्थं वसा योज्या ( अहृसू. १६.१०-११ ) मज्जपानयोग्याः–क्रूराशयाः क्लेशसहा वातार्ताः दीप्तवह्नयश्च मज्जपानयोग्याः ( सुचि. ३१.१८ ) स्नेहोपयोगः– उपयोगः द्विविधः बाह्य आभ्यन्तरश्च । तत्र बाह्यः देहाभ्यङ्गोऽवगाहः– शिरोऽभ्यङ्गादिः (सुचि.४.८)आन्तरः पानबस्त्यादिषु (सुचि.४.८)यथा न्यग्रोधादिगणसिद्धः स्नेहः ज्वरदाहनाशने अभ्यङ्गतयाऽवगाहने चोपयुक्तः ( सुउ. ३९.२८८–२८९ )

आभ्यन्तरोपयोगे प्रभूतमांसनिःक्वाथाजाङ्गला-नूपजात्रसान्स्नेहभृष्टेषु वा तेपु अतिसंहतां यवागूं वा तिलचूर्णं फाणितं सस्नेहम्। कृशरां भूरिस्नेहां तिलकाम्बलिकं सुखोष्णं सर्पिष्मतीं पेयां क्षैरेयीं ससितां, लवणयुक्तं सर्पिर्वा पयः सद्यः स्निग्धं प्रयोजयेत् ( असंसू. २५ ) भक्तेन सह स्नेहपानम्— ये सुकुमाराः कृशाः वृद्धा बाला: स्नेहद्विट्तृष्णार्ताः तथोष्णकाले सहभक्तेन स्नेहं पाययेत् (सुचि. ३१.३७) स्नेहो हि पानानुवासन-मस्तिष्कशिरोबस्ति–उत्तर–बस्तिनस्यकर्णपूरण-गात्राभ्यङ्गभोजनेषूपयोज्यः। तत्र जङ्गमेभ्यो गव्यं घृतं प्रधानं स्थावरेभ्यस्तिलतैलम् (सुचि. ३१.३-४) 'युक्त्याऽवचारयेत्स्नेहं भक्ष्याद्यन्नेन बस्तिभिः। नस्याभ्यञ्जनगण्डूषमूर्धकर्णाक्षितर्पणैः' (असंसू.२५; अहसू. १६.१४-१५) स्वस्थस्य स्नेहनार्थं कालभेदेन विविधः स्नेहोपयोगः। प्रावृषि तैलं, शरदि सर्पिः, वसन्ते वसामज्जानौ च युञ्ज्यात् (असंसू. २५; अहसू. १६.१२) सद्यःस्नेहनार्थं लवणोपहिताः स्नेहा उपयुक्ताः (असंसू. २५) स्नेहानां तारतम्यात् दोषघ्नता–तैलाद्वसा पित्तघ्नी। सर्पिः पित्तघ्नतमम्। तथा सर्पिषो मज्जा वातघ्नतरः वसा वातघ्नतरा तैलं वातघ्नतमम्। मज्जा वातश्लेष्मघ्नः वसा वातश्लेष्मघ्न-तरा तैलं वातश्लेष्मघ्नतममित्यवगन्तव्यम्

(अरु. अहसू. १६.३; असंसू. २५) केवलस्नेहपानम् स्नेहनकर्मणि श्रेष्ठः प्रयोगः आशुस्नेहकर्मसाधनात् ( असंसू. २५; अहसू. १६.१७ ) स्नेहपानक्रमः– लघुकोष्ठाय प्रातः काले यथाबलं स्नेहमात्रां पातुं प्रयच्छेत्। पीतमात्रे चोष्णोदकेनोपस्पृश्य सोपा-नत्को यथासुखं विहरेत् ( सुचि. ३१.१४) कोष्ठ-भेदात्स्नेहपानाऽवधिः–मृदौ कोष्ठे त्रिदिनमच्छं स्नेहं पिबेत्। क्रूरे सप्तदिनं यावद्वा स्निग्धलक्षणो_त्पत्तिः (अहसू. १६.२९-३०; चसि. १.६) मध्यम-कोष्ठापेक्षया पुरुषः स्नेहं चतुःपञ्चषडहानि पिबेत्। सप्तरात्रादनन्तरं स्नेहः सात्म्यीभवति

( सुचि. ३१.३६) अच्छस्नेहमात्रा–सा ह्रस्वमध्यो-त्तमभेदात्त्रिविधा। या मात्रा प्रयुक्ता जाठराऽबल-वशाद्द्वाभ्यां प्रहराभ्यां जरां नाम जरणं याति, सा ह्रस्वा। चतुर्भिर्यामैर्या जीर्यति, सा मध्यमा। अष्टाभिर्यामैर्या जीर्यति सोत्तमा मात्रा ( अरु. अहसू. १६.१७-१८; असंसू. २५ ) दोषादीन्वीक्ष्य ताभ्योऽपि ह्रसीयसीं यामपरिणामिनीं मात्रां परिकल्पयेत् (अहसू.१६.१८) ये नराः प्रभूतस्नेह-नित्याः क्षुत्पिपासासहाः, ते प्रभूतस्नेहसात्म्याः ( चसू. १३.३१ ) स्नेहः शमनार्थम्। रोगस्य शमनायोपयुज्यते। स जातबुभुक्षस्य शस्यते। अन्यो बृंहणः, स स्नेहो रसमद्याद्यैः सह शस्यते ( अहसू. १६.१९-२० ) स्नेहेऽनुपानम्–अच्छपेये सुखपक्तये स्नेहस्य प्रयोगात् पश्चादुष्णं वारि पिबेत्। ( अहसू. १६.२३ ) स्नेहनप्रयोगे भोजननियमः– स्नेहपानात्पूर्वदिने तथा यावन्ति दिनानि स्नेहं पिबति तावत् तथा समाप्ते स्नेहपाने तावन्त्येव दिनानि द्रवमुष्णमनभिष्यन्दि नातिस्निग्धमसङ्करं स्वल्पमन्नं मात्रया भोजयितव्यम्

( हे. अहसू. १६.२५ ) स्नेहप्रयोगे विहारनियमाः– उष्णोदकोपचारी ब्रह्मचारी क्षपाशयोऽवेगरोधी स्यात् किंच व्यायामक्रोधशोकहिमातपान् त्यजेत्। प्रवातयानयानाध्वभाष्य–अभ्यास–संस्थितिः नीचात्युच्चोपधानाअहःस्वप्नरजांसि यावंत्यहानि स्नेहं पिबति तानि तत्संख्याकानि तदनन्तरं च स्नेहा पानरहितान्यपि त्यजेत् ( अहसू. १६-२६-२८ ( अस्नेह्याः– अतिमन्दाग्निः तीक्ष्णाग्निः स्थूलो दुर्बल ऊरुस्तम्भातिसारामगलरोगगरोदरमूर्च्छा-च्छर्द्यरुचिश्लेष्मतृष्णामद्यैश्च पीडिताः अपप्रसूताश्चा-स्नेहनीयाः ( असंसू. २५; अहसू. १६.६-८ ) अजीर्णी मदपीडितः तरुणज्वरी श्रान्तो दत्तबस्ति-विरिक्तो वान्तोऽकाले प्रसूता च स्त्री, अकाले दुर्दिने चैव स्नेहपानं विवर्जयेत्

( सुचि. ३१.४६-४८ ) सम्यक्स्निग्धस्य वाता-नुलोमनमग्नेः प्रदीप्तत्वं वर्चसः स्निग्धत्वं मृदुत्वं च अंगेषु मार्दवं च स्निग्धता च अग्लानिश्च विमले-न्द्रियता, लाघवं स्नेहोद्वेगश्च, इत्येतानि लक्षणानि भवन्ति ( असंसू. २५; चसू. १३.६ ) पच्यमान-स्नेहलक्षणम्–तृड्दाहोऽरतिः क्लमः सादो भ्रमः ( सुचि. ३१.३३ ) शिरोरुग्निष्ठीवमूर्च्छादीनी जीर्य-त्स्नेहजे भवन्ति ( असंसू. २५ )

यदा जीर्यमाणस्नेहस्य लक्षणानि शान्तिं गच्छन्ति, तदा स्नेहो जीर्ण इति ज्ञायते (ड. सुचि. ३१.५४) जीर्णस्नेहलक्षणम्–अनुलोमाऽनिलस्वास्थ्यक्षुत्तृष्णो-द्गारशुद्धिभिः स्नेहो जीर्ण इति विजानीयात् ( असंसू. २५) जीर्णाजीर्णत्रिशङ्कायां पुनरुष्णोदक-पानं कुर्यात्, तेनोद्गारविशुद्धिस्तथा भक्तं प्रति

रुचिर्देहे लघुता च भवति, तदा जानीयात्स्नेहो जीर्ण इति ( सुचि. ३१.३२-३३; असंसू. १६.२४) **जीर्णे स्नेहे परिचर्या**– जीर्णस्नेहं नरमुष्णजलेन परिषेचयेत्। क्लिन्नाल्पतण्डुलामुष्णां यवागूं च कामं पाययेत् अग्निं दोषं च वीक्ष्य विलेपीयूषरसादीन् प्रयुञ्जीत ( ड. सुचि. ३१.३४-३५) **अस्निग्धलक्षणम्**– रूक्षं ग्रथितं पुरीषम् अप्रगुणो वायुर्मृदुरग्निः गात्रस्य खरत्वरौक्ष्ये च (चसू. १३.६) **अतिस्निग्धलक्षणम्**– पाण्डुता गौरवं जाड्यं पुरीषस्य चाविपक्वता तन्द्राऽरुचिरुत्क्लेशः (चसू. १३.६) अङ्गसदनं नासास्रावः लालास्रावः प्रवाहिका गुददाहः छर्दिर्मूर्च्छा तृष्णा शुष्कोद्गारः श्रमश्वासकासादयः स्नेहातिसेवनाद्भवन्ति ( असंसू. २५ ) **मिथ्यास्निग्धलक्षणम्**– शोफोऽर्शस्तन्द्रा निद्रा विसंज्ञिता कण्डूः कुष्ठं ज्वरोत्क्लेशौ जठरदौर्बल्यमिन्द्रियदौर्बल्यं जाड्यमामवाग्ग्रहादीनि लक्षणानि भवन्ति ( असंसू. २५) भ्रमादिका भवन्ति ( अहसू. १६.३२-३३ ) मिथ्यास्नेहेन वातरक्तं प्रकुप्यति ( सुनि. १.४१ ) **स्नेहव्यापदि उपक्रमः**– क्षुत्तृष्णानिग्रहौ वमनं स्वेदः पानान्नभेषजे रूक्षद्रव्याणि च देयानि ( अहसू. १६.३३-३५ ) **वातावृतस्नेहलक्षणम्**– अङ्गमर्द–ज्वर–आध्मान–शीत–स्तम्भ– ऊरुपीडन–पार्श्वरुगादयो भवन्ति ( चसि. ४.२६-२८ ) **पित्तावृते स्नेहे**– दाहरागतृष्णामोहतमकश्वासज्वरादीनि लक्षणानि भवन्ति ( चसि. ४.३१ ) **अत्यशनावृतस्नेहे**– छर्दिमूर्च्छाअरुचिग्लानिशूलनिद्रा-अङ्गमर्दाः सदाहैरामलिङ्गैश्च संयुतानि लक्षणानि भवन्ति ( चसि. ४.३४ )

**स्नेहफलम्**–स्नेहः आशु प्रयोजितः सन् संशुष्कान् धातून् पुष्णाति बलम् अग्निबलं पुष्टिं प्राणांश्चाभिवर्धयेत् ( चचि. २८.७९-८२ ) देहात्कफादयो दोषाः प्रणुद्यन्ते ( चसि. ६.११ ) यो नर आभीक्ष्ण्येन स्नेहमुपसेवते, स दीप्तान्तराग्निः परिशुद्धकोष्ठः नूतनधातुः बलवर्णयुक्तो दृढेन्द्रियो मन्दजरः शतायुश्च भवति इति प्रदिष्टम् ( अहसू. १६.४६ )

स्नेह देण्याचा विधि. स्नेहन–स्नेहद्रव्याने केले जाते. स्नेह दोन प्रकारचा. (१) स्थावर व (२) जंगम. (१) **स्थावर स्नेह**— तेल व तेलाखेरीज स्निग्ध असे दुसरे पदार्थ. (२) **जंगम स्नेह**—तूप, वसा, मेद, मज्जा. पण एकूण स्नेहाचे प्रकार चार. तूप, तेल, वसा व मज्जा. हे सर्व स्नेहात श्रेष्ठ आहेत व प्राणिज स्नेहांत गाईचे तूप श्रेष्ठ, व वनस्पतिजांत तिळाचे तेल मुख्य. **जडपणा हलकेपणा.** तुपापेक्षा तेल तेलापेक्षा वसा, वसेपेक्षा मज्जा गुरु (जड). स्नेहाच्या तीन संज्ञा-(१) यमक (जोडी) दोन कोणतेही स्नेह. (२) त्रिवृत (त्रयी) तीन कोणतेही स्नेह. (३) महा. चारही स्नेह. (१) तेलतुपाने यमक. (२) तेल, तूप व वसा मिळून त्रिवृत. (३) तेल, तूप, वसा व मज्जा मिळून महा. **स्नेह देण्यास योग्य**— ज्यांचा घाम काढणे व ज्यांना रेच वांती इत्यादींनी मळ शोधन करणे जरूर आहे ते, मद्यपी, स्त्रैण, व्यायामी, चिंतन करणारे, वृद्ध, बाल, अबल, कृश, रूक्ष, रक्तक्षीण, शुक्रक्षीण, वाताने पिडलेले, डोळे आलेले, दृष्टिदोष असलेले, कष्टाने डोळे उघडणारे हे सर्व स्नेह देण्यास योग्य. प्रथम रूक्ष करून नंतर स्नेहन द्यावे. तो स्नेह आत्मसात न झाला तर मळांना बाहेर काढण्यास समर्थ होतो. **तूप पिण्यास योग्य**— बुद्धि, स्मृति चांगली व्हावी अशी इच्छा असणाऱ्यांनी तूप प्यावे. **तेल पिण्यास योग्य**— हलकेपणा व शरीर बळकट इच्छिणारा. कडक कोठा, ग्रंथि, नाडी, कृमि, कफ, मेद व वाताचे रोग असणारा यांना तेल हितकर. **वसा पिण्यास योग्य**— पुरुषत्व कमी असणारा व व्यायाम घेणारा यांनी वसा प्यावी. तसेच धातु क्षीण असेल, संधि, हाडे, मर्म, कोठा यात व जळाल्याच्या आणि आघाताच्या वेदना, योनि बाहेर येणे, अतिशय डोके दुखणे, वाताने मार्ग आवृत होणे, अग्नि फार तीव्र असणे (भस्मक) यांत वसा द्यावी. **मज्जा पिण्यास योग्य**— कोठा कडक, वाताने पीडित, अग्नि प्रदीप्त व क्लेश सहन करणाऱ्यांना मज्जा द्यावी. **स्नेहाचा उपयोग**— दोन प्रकार, बाह्य व आभ्यंतर. **बाह्य**— डोके, शरीर यांना स्नेह लावणे व स्नेहाच्या डोणीत बसणे इत्यादी. **आभ्यंतर**— पिणे, बस्ती इत्यादी. जसे ज्वर, दाह असताना वड इत्यादी गणाने सिद्ध तूप, अभ्यंग म्हणून माखण्यासाठी किंवा डोणीत शरीर अथवा अवयव बुडण्यासाठी उपयुक्त. हे बाह्य व आंतून **उपयोग**-जांगल आणि आनूप प्राण्याच्या मांसाचे काढे रस त्यांना स्नेहाची फोडणी देऊन किंवा

तशीच अति दाट अटवल, तिळाची चटणी, पुष्कळ स्नेहयुक्त खिचडी, काकवी, खूप स्नेह घातलेले तिळाचे सांभारे किंवा कढी. तूप घातलेली कोमट पेज किंवा दुधात केलेली पेज ( खडीसाखर घालून ) सैंधव युक्त तूप किंवा दूध ही ताबडतोब शरिराला स्निग्ध करण्यासाठी योजावी. **जेवणाबरोबर स्नेहपान**- जे सुकुमार, कृश, वृद्ध, बाल, स्नेहाचा तिटकारा असणारे, तहान ज्यांना अधिक लागते, त्यांनी व उष्ण ऋतूत हे स्नेहन अन्नाबरोबर करावे. **स्नेह देण्याचे प्रकार**-पिणे, अनुवासनबस्ति, शिरोबस्ति, उत्तरबस्ति, नाकात कानात घालणे, अभ्यंग, भोजन, गुळण्या करणे, डोळ्यात घालणे या प्रकारानी स्नेहाचा उपयोग करतात. जंगम स्नेहात गाईचे तूप श्रेष्ठ आणि स्थावरस्नेहात तिळ-तेल श्रेष्ठ आहे. **काल भेदाने स्वस्थाला स्नेह देण्याचा प्रकार**- वर्षाकालात तेल, शरदात तूप, वसंतात वसा व मज्जा योजावीत. ताबडतोब स्नेहन व्हावे म्हणून सैंधव घालून स्नेह द्यावा. **दोषघ्नतेचे तारतम्य**-तेलापेक्षा वसा पित्तघ्न, तूप सर्वश्रेष्ठ पित्तनाशक. तुपापेक्षा मज्जा अधिक वातनाशक त्या पेक्षा वसा अधिक वातघ्न व तेल सर्वात अधिक वातघ्न. मज्जा वातकफघ्न वसा अधिक वातकफघ्न व तेल सर्वात अधिक वातकफघ्न होय. केवळ स्नेह पिणे स्नेहन कर्मात श्रेष्ठ आहे. कारण स्नेहनाचे कार्य लवकर होते. **स्नेहपानाचा क्रम**-हलका कोठा असेल त्याने सकाळी शक्तीप्रमाणे स्नेह घ्यावा. स्नेह पिताच ऊन पाण्याने तोंड स्वच्छ करून पायात पायतण घालून मजेने फिरावे. **कोठ्या प्रमाणे काळ**— हलका कोठा असेल तर तीन दिवस केवळ स्नेह प्यावा, कोठा जड असेल तर सात दिवस, जोपर्यंत शरीर स्निग्ध होते तो पर्यंत, मध्यम कोठा असेल तर चार पाच किंवा सहा दिवस स्नेह प्यावा. सात दिवसानंतर स्नेह सात्म्य होतो. **केवळ स्नेहाची मात्रा**— अल्प, मध्यम, उत्तम अशी तीन प्रकारची. ती क्रमाने दोन, चार व आठ प्रहरांनी जठराग्नी-च्या शक्तीप्रमाणे जिरते. दोष पाहून एका प्रहरात जिरणारी अल्पतर मात्रा ठरवावी. जे लोक पुष्कळ स्नेह दररोज घेतात व भूक तहान सहन करतात ते पुष्कळ स्नेहसात्म्य झालेले असतात. ( १ ) **शमन स्नेह**- रोगाचे शमन होण्याकरिता स्नेह देतात तो भूक लागल्यावर द्यावा. ( २ ) **पौष्टिक स्नेह**— तो मांस रस, मद्य इत्यादी बरोबर द्यावा. **अनुपान**— केवळ स्नेह प्याल्यावर ऊन पाणी प्यावे. **स्नेह प्रयोगाच्या वेळी भोजन नियम**-स्नेहपानाच्या आदले दिवशी, स्नेहपानाच्या दिवशी व नंतर जितके दिवस स्नेहपान केले तितके दिवस पातळ उष्ण फार आर्द्रता न निर्माण करणारे, फार स्निग्ध नसलेले पथ्याचे इतर मिश्रण नसलेले थोडे अन्न मित प्रमाणात प्यावे.

**स्नेहाच्या प्रयोगा च्या वेळी विहार नियम**— ऊन पाण्याचा वापर करावा, ब्रह्मचारी असावे; रात्री झोप घ्यावी, वेगाचा अवरोध करणे, व्यायाम, रागावणे शोक करणे, थंडी, ऊन यांचा त्याग करवा. जोराचा वारा, वाहनातून जाणे, प्रवास, अधिक बोलणे, सारखे बसून राहणे, अभ्यास, फार बारीक किंवा फार जाड ( उंच ) उशी, दिवसा झोप, धूळ यांचा जितके दिवस स्नेहपान होते तितके व आणखी तित-केच दिवस त्याग करावा. **स्नेहन करण्यास अपात्र**—अति मंद वा अति तीव्र अग्नि असलेला, स्थूल, दुर्बल; उरुस्तंभ, अतिसार, आम, गलरोग, गरोदर, मूर्च्छा, ओकारी, अरुची, कफ, तहान व मदविकार यांनी पीडित; दुपावलेली स्त्री, अजीर्णी, नवज्वरी, थकलेला, बस्ति घेतलेला, रेच-वांती झालेला अशांनी, अकाली, सूर्यदर्शन नाही अशा दिवशी स्नेहपान करू नये. **व्यवस्थित योग्य तितके स्निग्ध झाल्याचे लक्षण**—वात व्यव-स्थित सरणे, अग्नि प्रदीप्त होणे, मळ स्निग्ध व मऊ होणे, शरीर मऊ स्निग्ध होणे, ग्लानि नसणे, इंद्रिये निर्मल होणे, हलकेपणा व स्नेहाचा तिटकारा येणे. **स्नेह पचत असल्याचे लक्षण**—तहान, दाह, बेचैनी, थकवा, अंग गळणे, भ्रम, डोके दुखणे. थुंकी येणे, मूर्छा इत्यादी. जेव्हा ही लक्षणे नाहीशी होतात तेव्हा स्नेह जिरला असे समजावे. **जिरलेल्या स्नेहाचे लक्षण**—वाताची सर्व कार्ये व्यवस्थित झाली, स्वस्थता आली, भूक तहान लागली व शुद्ध ढेकर येऊ लागली की स्नेह जिरला असे समजावे. स्नेह जिरला की नाही अशी शंका असेल तर ऊन

पाणी प्यावे म्हणजे स्नेह जिरतो. त्याने ढेकर शुद्ध येते व शरीर हलके होते व अन्नावर रुची उत्पन्न होते. **स्नेह जिरल्यानंतरची वागणूक**—ऊन पाणी शिंपडावे. धुतलेल्या भिजवलेल्या थोड्या तांदळाची उष्ण यवागू यथेच्छ प्यावी. दोष व पचनशक्ति पाहून पेज, कढण मांसरस इत्यादी द्यावीत. **स्निग्ध न झाल्याचे लक्षण**—मळ रूक्ष गाठाळ, वायूचा अवरोध, अग्नि मंद, अवयव रखरखीत, रूक्ष असतात.

**अतिस्निग्ध लक्षण**—पांढरटपणा, जडपणा, अपक्व मळ, झापड, अरुचि, घशाशी येणे, अंग गळणे, नाकातून स्राव, लाळ गळणे, आव, गुदाची भगभग, ओकारी, मूर्च्छा, तहान, कोरडी ढेकर, भ्रम, श्वास, खोकला इत्यादी विकार स्नेहाचे अतिसेवन केल्याने होतात. अयोग्य काळी, दोषविचार न करता, अयोग्य स्नेह, अयोग्य मात्रेने घेतलेला स्नेह घेतल्यावर चुकीचे आहार विहार घेतले तर जी स्निग्धता येते ती मिथ्या असते. मिथ्यायोग **लक्षणे**-सूज, मूळव्याध, झापड, झोप, संज्ञानाश, खाज, कुष्ठ, ज्वर, घशाशी येणे, आमाशय व इंद्रिये यांची दुर्बलता, जडपणा, आम, बोलणे अडखळणे, भ्रम इत्यादी होतात. चुकीच्या स्नेहपानाने वातरक्त वाढते.

**स्नेहाच्या दुष्परिणामाचे उपचार**-भूक, तहान आवरून धरणे; ओकारी, घाम काढणे; रूक्ष-द्रव्यांचा पान अन्न व औषधात उपयोग. **वाताने स्नेह आवृत झाला तर लक्षणे**—अंग दुखणे, ताप, पोटफुगी, थंडी, अंगजखडणे, मांड्या दुखणे, फासळ्यात वेदना होतात. **पित्ताने आवृत तर**—दाह, लाली, तहान, विचारशून्यता, तमकश्वास, ज्वर इ० **फार खाण्याने आवृत तर**—ओकारी, मूर्च्छा, अरुची, ग्लानी, शूल, झोप, अंगदुखी, आग व आम चिन्हे. **स्नेहनाचे फळ**—शुष्क धातूंची पुष्टि, बळ, अग्नीचे बळ, प्राण-जीवन शक्ति वाढते. शरिरातून कफादी दोष बाहेर घालविले जातात जो नेहमी स्नेहसेवन करितो त्याचा अग्नि प्रदीप्त असतो, कोठा शुद्ध होतो, नवे धातु शक्ति आणि वर्ण युक्त होतात. इंद्रिये बळकट होतात. वार्धक्य हळुहळु येते व शंभर वर्षांचे आयुष्य लाभते.

**-क्लान्त**-वि., **स्नेहपानोद्विग्नः, स्नेहग्लानः** ( चचि. २८.७६ ) स्नेह पानाने उद्विग्न, ग्लानि आलेला.

**-क्लिन्न**- वि., **स्नेहेनाऽऽप्लुतः, स्नेहपानेनाप्लुतः** ( अहृसू. १७. २९ ) स्नेहाने माखलेला, स्नेहपानाने व्याप्त.

**-गण्डूष**-पु., उपक्रम० **मधुरादिसाधितैः स्नेहैः कृतो गण्डूषः** ( सुचि. ४.२२ ) **असञ्चार्यमात्राप्रमितो गण्डूषः** ( सुचि. ४०.६२ ) गोड, कडु इत्यादिकांनी सिद्ध केलेल्या स्नेहांनी केलेली गुळणी. प्रमाण-तोंडात घेतल्यानंतर हालविता येणार नाही इतक्या प्रमाणाला गंडूष म्हणतात.

**-गण्डूषधारण**-न., कर्म० (असंसू. ३) **स्नेहगण्डूषधारणं दन्तदार्ढ्यकरं रुचिप्रदं च** ( सुचि. २४.१४) स्नेहाची गुळणी धरणे दात बळकट करणारे व रुचि करणारे आहे.

**-ग्लान**-वि., **स्नेहेन ग्लानः** ( चसू. १३.५५ ) स्नेहाने थकलेला.

**-तृषा**-स्त्री., लक्षण० **स्निग्धान्नजा तृष्णा** ( चचि. २२.५२ ) **स्नेहपानजा तृष्णा** ( चचि. २२.५२ ) स्निग्ध अन्नाने किंवा स्नेह प्याल्याने उत्पन्न झालेली तहान.

**-दग्ध**-पु., रोग० **तप्ततैलघृतादिभिः दग्धत्वम् तच्च दहनं कष्टतरं भवति, स्नेहस्य सूक्ष्ममार्गानुसारित्वाद्दूरमनुप्रवेशाच्च** (असंसू. ४०) **चिकित्सा–तत्र रूक्षं भेषजम्** ( असंसू. ४० ) तापलेल्या तेल तूप इत्यादींनी जळणे. हा डाग अधिक त्रासदायक असतो. कारण स्नेह हा सूक्ष्ममार्गात व दूर जातो म्हणून हा डाग खोल असतो. उपचार-येथे रूक्ष उपचार करावे.

**-दाह**-पु., द्र० **'स्नेहदग्ध'** (असंसू. ४० ) **स्नेहेन दहनम्** ( असंसू. ४०; अहृसू. ३०.४८ ) स्नेहाने डाग देणे.

**-द्रोणी**-स्त्री., पात्र० **स्नेहपूर्णः कटाहः। शस्त्रकर्मानन्तरमुदरिणां निवासनार्थम्** ( असंचि. १७ ) स्नेह भरलेली डोणी. उदरी रोग्याला शस्त्रकर्म केल्यानंतर ठेवण्याकरिता उपयोगी.

**-द्विष्**-वि., **स्नेहं द्वेष्टि इति** ( अहृसू. १६.२० ) तेलतुपादिकांचा तिटकारा असणारा.

**-नित्य**-वि., **स्निग्धाहारादिशीली** (अहृसू. ७.६०) नेहमी स्निग्ध आहारपानादी सेवन करणारा.

**–निवृत्ति**–स्त्री., बस्तिव्यापद्० स्नेहस्याऽप्रवृत्तिः (अहसू. १९.३१)
बस्तीचा अनिष्ट परिणाम. स्नेहाची प्रवृत्ति नसणे.

**–पक्ति**–स्त्री., स्नेहपाकः (अहसू. १९.३४) (असंसू. २८)
स्नेह पचणे.

**–परिहार**–पु., स्नेहे पीतेऽपथ्यम् यथा शीतोदकादि (अहसू. १६.३९)
स्नेह प्याल्यावर सोडावयाचे अपथ्य. जसे थंड पाणी इत्यादी.

**–पाक**–पु., भैषज्यद्रव्य० स्नेहस्य पाकः। स त्रिधा मृदुमध्यखरभेदेन (चक. १२.१०२) किट्टे कल्कसमे सति मन्दो मृदुर्वा पाकः किट्टे मदनोपमे मध्यश्चिक्कणो वा पाकः । किट्टे सीदति सति वर्णतः कृष्णे च खरः खरश्चिक्कणो वा पाकः (असंक. ८) स्नेहौषधयोः पृथक्भावमात्रं यस्मिन्भेषजे तत्तादृशं भेषजं यत्र स्नेहे स मृदुः। स्नेहे सिद्धे सति यत्र मधूच्छिष्टमिव विशदं नाम अपिच्छिलमङ्गुल्यादौ अविलेपि (पैच्छिल्यगुणाभावाद्) भेषजं भवति, स मध्यमपाकः। यत्र कृष्णमीषदवसन्नं विशदं चिक्कणं च भेषजं, स खर इति। अत ऊर्ध्वं दग्धस्नेहो भवति, स दग्धस्नेहपाकः। तत्र पानाभ्यवहारयोर्मृदुः। नस्याभ्यङ्गयोर्मध्यमः। बस्तिकर्णपूरणयोस्तु खरपाकः उपयुज्यते (सुचि. ३१.११; चक. १२.१०३-१०४)
औषधांनी स्नेह सिद्ध करणे, पचवणे, पाक प्रकार तीन– मऊ, मध्य, कठीण. स्नेहातील औषधींचा गाळ चटणीसारखाच मऊ व स्नेहापेक्षा निराळा असला तर तो मृदुपाक; मेणासारखा व बोटांना न चिकटणारा तो मध्य किंवा चिक्कणपाक, गाळ दाबला असता तेवढा भाग स्नेहापासून निराळा होतो व काळ्या रंगाचा होतो, त्याला खर किंवा खरचिक्कण पाक म्हणतात. यापेक्षा अधिक पाक झाला, स्नेह जळाला तर त्याला सदग्ध– जळालेला म्हणतात. खाण्यापिण्याला मृदु, नस्य व अभ्यंगाला मध्यम व बस्ति व कानात घालण्यास खरपाक योजतात.

**–पाककल्प**–पु., स्नेहपाकविधिः। स्नेहाच्चतुर्गुणो द्रवः स्नेहचतुर्थांशो भेषजकल्कः तदैकध्यं संसृज्य विपचेदित्येष स्नेहपाककल्पः (सुचि, ३१.८) स्नेहकुडवे भेषजपलं पिष्टं कल्कं चतुर्गुणं द्रव्यमावाप्य विपचेत् (सुचि. ३१.८)
स्नेह सिद्ध करण्याचा विधि व प्रमाण–स्नेहाच्या चौपट द्रव व चतुर्थांश औषधाची चटणी. ही एकत्र ठेवून उकळणे. बत्तीस तोळे स्नेहात चार तोळे चटणी व १२८ तोळे द्रव टाकून पचवावे.

**–पान**–न., उपक्रम० स्नेहस्य पानम् (सुचि. ३१.१४) द्र० 'स्नेह'
स्नेहाचे पान, स्नेह पिणे.

**–पानक्रम**–पु., स्नेहपानपरिपाटी (सुचि. ३१.१४)
स्नेह पिण्याचा क्रम, पद्धत.

**–पायिन्**–वि., यः स्नेहनार्थं स्नेहं पिबति सः (अहसू. ६.३०)
स्नेहन करून घेण्याकरिता स्नेह पिणे.

**–पिचु**–पु., उपक्रम० स्नेहयुक्तः पिचुः (चचि. ३०.१०८)
स्नेहयुक्त बोळा.

**–पीत**–वि., येन स्नेहः पीतः (सुचि. ३९.३; अहसू. १९.५३)
स्नेह प्यालेला.

**–प्रगाढ**–वि., स्नेहबहुलः (सुचि. ३७.४५)
ज्यात स्नेह पुष्कळ आहे तो. (पदार्थ)

**–प्रयोग**–पु., उपक्रम० स्नेहपानस्य प्रयोगः द्र० 'स्नेह' (अहसू. १६.२६-२८)
उपचार; स्नेहपानाचा प्रयोग.

**–प्रियालबीज**–पु., वनस्पति० प्रियालः (ध. ५.७२)
चारोळी.

**–फल**–न., स्नेहप्रधानं फलम् तिलैरण्डातसीबिभीतकादिकम् (सुचि. ४०.४)
स्नेह ज्यात प्राधान्याने असतो असे फळ. तीळ, एरंड, अळशी, बेहडा, इत्यादी.
स्नेहपानस्य फलम्, द्र० 'स्नेह' (सुचि. ३१.५६)
स्नेहपानाचे फळ.

**–फलसार**–पु., स्नेहफलानां तिलादीनां सारस्तदन्तर्गतो मज्जा (सुचि. ४०.४)
स्नेहयुक्त फळांचा–तीळ इत्यादी फळांचा सार–त्यांची अंतर्गत मज्जा–मगज.

**–बस्ति**–पु., उपक्रम० स्नेहस्य बस्तिः। स्नेहयुक्तः बस्तिः (चसि. ४.३) अनुवासनबस्तिः

( अहृसू. ४.२९ ) **सिद्धस्नेहाः सर्पिरादयो बस्तिविधिना दीयन्ते, स स्नेहबस्तिः** ( सुचि. ३८.८८ )
एक उपचार. स्नेहाचा बस्ती. स्नेहयुक्त बस्ती. अनुवासनबस्ती.
तेल इत्यादी बस्तिविधीने दिली जातात.

**-भर्जिता**-वि., **स्नेहभृष्टा ( पेया )** ( अहृसू. १६.४० )
स्नेहात भाजलेले. फोडणी दिलेले. स्नेहात परतलेले.

**-भावित**-वि., **स्नेहपानेन स्निग्धः** ( अहृसू. १८.५७ )
स्नेह पिऊन स्निग्ध झालेला.

**-मांस**-न., **स्नेहप्रधानं मांसम् । आनूपप्राणिमांसम्** ( सुउ. १८.२३ )
स्नेह प्राधान्याने असलेले मांस-जल वृक्ष भूयिष्ठ (आनूप) प्रदेशातील प्राण्यांचे मांस.

**-मात्रा**-स्त्री., **स्नेहस्य प्रमाणम्** ( चसू. १३.२९ )
स्नेहाचे प्रमाण, माप, वजन.

**-मिथ्योपचार**-पु., **स्नेहपाने मिथ्या उपचरणम्** ( चसू. १३.६४ )
स्नेह पिण्यात चुकीचे उपचार. स्नेहपानानंतर चुकीचे उपचार.

**-लवण**-न., **लवण० काण्डलवणम्** ( सुचि. ४.३१ )
एक मीठ. काण्डलवण.

**-लवणयोग**-पु., **स्नेहलवणयोः संयोगः; अयम् अग्नौ क्षिप्तः सन्निन्द्रायुधवद्वर्णान् चटचटाशब्दं चोत्पादयति** ( असंसू. ८ )
स्नेह व मीठ यांचा संयोग. हा अग्नीवर टाकला तर इंद्रधनुष्यासारखे रंग व चटचट शब्द उत्पन्न करतो.

**-वध्य**-वि., **स्नेहेन वध्यो नाम विनाश्यः शमनीयो वा ( व्याधिः )** ( काखि. ११.८९ )
स्नेहाने नष्ट होणारा, शमन होणारा. (रोग).

**-वमी**-स्त्री., **वनस्पति० मेदा** ( रा. ५.१६१ )
मेदा, अष्टवर्गांपैकी एक.

**-वर्ग**- पु., **स्निग्धद्रव्यसमूहः । येभ्यः स्नेहस्य सम्भवः, तेषां द्रव्याणां समूहः । यथा तिलातस्यौ च । घृतं तैलं वसा च इत्यादीनि स्निग्धद्रव्याणि तथैव कङ्गुणी-करञ्ज-श्रीफल-सिद्धार्थ-सोमराजी-बिभीतक-अतसी- निम्ब- तिल- दन्ती- भल्लातका इत्यादीनि चेति** ( र. २.१३३ )
स्निग्ध द्रव्यांचा गण. ज्यांच्यापासून स्नेह निघतो त्या द्रव्यांचा समूह. जसे तीळ, अळशी. तूप, तेल, वसा, मज्जा ही स्निग्ध द्रव्ये होत. तसेच मालकांगोणी, करंज, बेल, मोहरी, बावची, बेहडा, अळशी, निंब, तीळ, दांती, बिब्बा इत्यादी.

**-वर्ज**-वि., **स्नेहरहितम्** ( सुचि. ५.३३ )
स्नेहरहित, स्नेहावाचून, स्नेहाशिवाय.

**-वर्ति**-स्त्री., **स्नेहयुक्ता पट्टवर्तिः** ( सुचि. २.७१ )
स्नेहयुक्त वात. कापसाची स्नेहयुक्त वात.

**-विद्ध**-न., **वनस्पति० देवदारुः** ( ध. १.७६ )
देवदार.

**-विधि**-पु., **उपक्रम० स्नेहकर्म** ( चसू. १.९०; अहृसू. १६.१२ ) **द्र० 'स्नेह'**
स्नेहविधि. स्नेहकर्म. स्नेहनाची रीति.
**अध्यायसंज्ञा०** ( असंसू. २५; अहृसू. १६.१ )
अध्यायाचे नाव. यात स्नेह घेण्याची पद्धत दिली आहे.

**-विभ्रम**-पु., **रोग० स्नेहस्य दुरुपयोगाद्विशिष्टो भ्रमः-अव्यवस्था स्नेहमिथ्यायोग इति यावत्** ( चसू. १३.७६ )
स्नेहाचा वाईट उपयोग. स्नेहाचा दुरुपयोग झाल्याने झालेली शरीर विकृती, दोषवैषम्य, अव्यवस्था.

**-विरेचन**-न., **उपक्रम० स्नेहयुक्तं विरेचनम्** ( चक. १२.८३; सुचि. ४.२१ ) **एरण्डतैलादिना विरेचनम्** ( सुउ. ४९.२० ) **तद्रूक्षस्य योग्यम्** ( काखि. ७.२९ ) **एरण्डस्नेहः** ( सुचि.३३.४१ )
एक उपचार. स्नेहयुक्त किंवा एरंड तेल इत्यादी स्नेहाचेच विरेचन, ते रूक्षाला योग्य. एरण्डतेल.

**-व्यापत्ति**-स्त्री., **स्नेहस्य दुरुपयोगान्मिथ्यायोगाजनितो व्याधिः** ( चसू. १३.७८ )
स्नेहाच्या दुरुपयोगाने झालेला रोग.

**-व्यापत्तिभेषज**-न., **स्नेहव्यापत्तिजन्याधिनाशनार्थमुपयुक्तं द्रव्यम्** ( चसू. १३.७८ )
स्नेहाच्या चुकीच्या उपयोगाने उत्पन्न झालेल्या रोगाचा नाश करणारे द्रव्य.

**-व्यापत्साधन**-न., **स्नेहपानजन्यरोगे चिकित्सितम्** ( अहृसू. १६.३४ )
स्नेहाच्या चुकीच्या उपयोगामुळे उत्पन्न झालेल्या रोगाचा उपचार.

**-व्यापत्सिद्धि**-स्त्री., अध्याय० संज्ञा० (चसि. ४.१)
अध्यायाचे नाव. यात स्नेहाच्या दुरुपयोगाने उत्पन्न झालेल्या रोगांचे उपचार सांगितले आहेत.

**-व्यापद्**-स्त्री., **स्नेहातियोगादि-समुत्थः विकारः** ( सुसू. ४५.४४; अहृसू. १६.३५; असंसू. २५ )
स्नेहाचा अति उपयोग. चुकीचा उपयोग इत्यादीमुळे होणारा विकार.

**-शर्करा**-स्त्री., **स्नेहप्रधाना शर्करा, स्निग्धगुणं चूर्णम् । स्नेहस्य संहताऽवस्थितत्वान्मधुशर्करावत्स्नेहशर्करा** ( चचि. २५.७६ )
सिध्द केलेली स्नेहप्रधान साखर. मधाच्या बनलेल्या साखरेसारखी स्नेहाचे बनलेले घन कण; स्नेहशर्करा.

**-शोधनयुक्ति**-स्त्री., **स्निग्धस्य शोधनोपायः** ( अहृसू. १९.६७ )
स्निग्धाच्या शोधनाचा उपाय. स्नेह बस्ती, शोधन ( निरूह ) बस्ती असे क्रमाने बस्ती देणे ही युक्ती. क्रमाने स्नेह बस्ती शोधन बस्ती रूपी युक्ती.

**-समृद्ध**-वि., **स्नेहसमृद्धः** ( चसू. १३.७२ )
स्नेहाने समृद्ध. स्नेहाने भरलेला.

**-सात्म्य**-वि., **स्नेहः सात्म्यः यस्य सः** ( सुचि. ३३. ४४ )
ज्याला स्नेह सात्म्य झाला आहे ( मानवला आहे ) असा.

**-सार**-वि., **स्नेह एव सारो बलं यस्य, सः** ( सुचि. ३१.३ )
स्नेह हाच ज्याचे बल आहे असा ( पुरुष ).

**-सिक्त**-वि., **स्नेहेनावसेचितः** ( सुचि. २४.३२ )
स्नेहाने सिंचन केलेला.

**-सिद्धि**-स्त्री., **घृततैलादिस्नेहानां सिद्ध्यर्थं क्रियमाणः पाकः । सम्यक्सिद्धस्य लक्षणम्-शब्दफेनयोरुपशमो गन्धवर्णरसादीनां समृद्धिश्च** (सुचि. ३१.१२-१३) **भैषज्यमङ्गुलिभ्यां गृह्यमाणमनतिमृद्वनतिदारुणमनङ्गुलिग्राहिताविशिष्टं च स्यात्** ( असंक. ८ )
तेल, तूप इत्यादी स्नेहांचा सिद्धीकरिता केलेला पाक. स्नेह योग्यरूपाने तयार होणे. **लक्षण—** तयार झाला की उकळताना होणारा शब्द व फेस नाहीसे होतात, योग्य तो वास, रंग, रस होतात. त्यांतले औषध बोटांनी पाहिले तर ते अति मऊ किंवा अति खरखरित लागत नाही व बोटांना ते चिकटत नाही.



**स्नेहन**-वि., **स्नेहजनकम्** ( चसू. १.८७ ) **स्नेहयतीति, घृततैलवसादिवत्** ( सुसू. १४.३ )
न., **स्नेहविधिः, स्नेहक्रिया** ( चसू. १३,१२ )
स्नेह निर्माण करणारे. स्निग्ध करणारे. तूप, तेल, वसा जसे शरिराला स्निग्ध करतात तसे. स्नेह घेण्याची रीति.

**-कर्मन्**-न., उपक्रम० **स्नेहविधिः** ( असंसू. २४.५-६ )
स्नेह घेण्याचा विधि. एक उपचार.

**स्नेहयितव्य**-वि., **स्नेहनीयः, कर्तव्यस्नेहनकर्मा** ( चसू. ४३.४९ )
स्नेहन करण्यास योग्य. ज्याला स्नेहन करावयाचे आहे तो.

**स्नेहाग्नि**-पु., **स्नेहेनात्यधिकेनोद्दीप्तोऽग्निः** ( चसू. १३.७१; असंसू. २५ )
स्नेह सेवनाने अतिशय प्रदीप्त झालेला अग्नि.

**स्नेहाचार**-पु., **स्नेहोपचारे पथ्याऽपथ्यम्** ( अहृसू. १८.२७ )
स्नेह घेतल्यानंतर करावयाचे पथ्यापथ्य.

**स्नेहाजीर्ण**-न., **स्नेहस्य अपचनम्** ( सुचि. ३१.३१ )
स्नेह न पचणे.

**स्नेहाञ्जन**-न., अञ्जन० **ताम्रपात्रस्थितं मांसं सर्पिःसैन्धवसंयुतमिति स्नेहाञ्जनमेके आहुः । इदं वाताभिष्यन्दे उपयुक्तम्** ( सुउ. ९.१६ )
तांब्याच्या पात्रात ठेवलेले मांस, तूप सैंधव युक्त करून त्याचे अंजन करणे. हे वाताने आलेल्या डोळयांना उपयुक्त.

**स्नेहाध्याय**-पु., अध्यायसंज्ञा० ( चसू. १३.१; ( कासू. २२.१ )
अध्यायाचे नाव. यात स्नेहाबद्दलची सर्व माहिती आहे.

**स्नेहान्वित**-वि., **घृतादियुक्तम् स्नेहगुणैर्युक्तम्** ( सुचि. ४.२३ )
तूप इत्यादीयुक्त. स्नेहाच्या गुणांनी युक्त.

**स्नेहाशय**-पु., **स्नेहस्थानम् । तच्च द्विविधं स्थावरं जङ्गमं च** ( चसू. १३.११ ) **यथा दधिक्षीरं मांसास्थि फलादारु च** ( असंसू. २५ )
स्नेहाचे स्थान. दोन प्रकारचे. स्थावर, जंगम. जसे दही दूध मांस अस्थि हे जंगम स्नेहाचे आशय व तीळ बदाम इ० फल स्नेहाची व देवदार चंदन इ० स्थावर स्नेहाची उदाहरणे होत.

**स्नेहोचित**–वि., स्नेहसात्म्यः ( अहृसू. १६.३८ )
स्नेह ज्याला मानवतो आहे असा, स्नेहसात्म्य.

**स्नेहोत्क्लिष्ट**–वि., स्नेहेनोत्क्लिष्टः ( चसि. ६.९ )
स्नेहन केल्यावर ज्याचे दोष उचंबळून आलेले आहेत असा. घशाशी येणे इत्यादी.

**स्नेहोत्क्लेश**–पु., स्नेहस्य कोपः ( असंसू. २८ )
स्नेहाचा कोप. स्नेह शरिरात गरजेपेक्षा अधिक होणे व तद्दर्शक चिन्हे होणे. स्नेह साठल्यामुळे आमाशयात उचंबळणे.

**स्नेहोत्तम**–न., स्नेह० तैलम् ( ध. ६.१२५ )
तेल. तिळाचे तेल.

**स्नेहोद्वेग**–पु., लक्षण० स्नेहद्वेषः सम्यक्स्निग्धलक्षणान्यतमम् ( अहृसू. १६.३१ )
स्नेहाचा तिटकारा वाटणे. योग्य स्निग्ध झाल्याचे लक्षण.

**स्नेहोपगगण**–पु., गण० स्नेहस्य सर्पिरादेः स्नेहनक्रियायां सहायत्वेनोपगच्छतीति स्नेहोपगः ( चसू. ४.८ ) तत्र द्रव्याणि-मृद्वीका-मधुक-मधुपर्णी - विदारी- काकोली - क्षीरकाकोली - जीवक-जीवन्ती-शालिपर्णी इति दशद्रव्याणि
( चसू. ४.१३(२१); असंसू. १५ )
तूप, तेल, इत्यादी द्रव्यांनी स्नेहन करताना स्नेहनाला साहाय्यभूत असणारी द्रव्ये. मनुक, जेष्ठमध मोरवेल, मेदा, भुईकोहळा, कावळी, दूधकावळी जीवक, हरीणदोडी, सालवण ही दहा द्रव्ये.

**स्नेहोपयौगिक**–वि., स्नेहस्योपयोगो यस्मिन् कर्मणि तत् स्नेहोपयौगिकम् ( सुचि. ३१.१ )
ज्या कर्मात स्नेहाचा उपयोग होतो ते.

**स्नेहोपयौगिक**–न., चिकित्सितअध्यायसंज्ञा० स्नेहस्योपयोगो यस्मिन् कर्मणि तत्स्नेहोपयौगिकम्
( सुचि. ३१·१ )
अध्यायाचे नाव. ज्या कर्मात स्नेहाचा उपयोग आहे त्या सर्वांची माहिती यात आहे.

**स्नेहोपसेविन्**–वि., आभीक्ष्ण्येन स्नेहं यः सेवते, सः ( सुचि. ३१.५६; असंसू. २५; अहृसू. १६.४६ ) द्र०' स्नेह '
नित्य स्नेहाचे सेवन करणारा.

**स्नेह्य**–वि., स्नेहकर्मयोग्यः द्र० 'स्नेह'
( चसू. १३.६; अहृसू. १६.५-६ )
स्नेहन करण्यास योग्य. स्नेह देण्यास योग्य ( रूक्षादि )

**स्नैग्ध्य**–न., स्निग्धता ( सुसू. ३२.३ )
स्निग्धता, स्निग्धपणा, स्निग्धत्व.

**स्नैहिक**–वि., स्नेहकृतम् (नावनादिकम्) (चसू. ५.४०)
स्नेहाच्या सहायाने केलेले. (नस्य कर्णपूरण इत्यादी )

–**धूम**–पु., धूम० द्र० 'धूम' ( चसू. ५.३७ )
स्नेहयुक्त धूम्र–धूर.

–**नस्य**–न., स्नेहमयं नस्यम् द्र० 'नस्य' (सुचि.४.२२)
स्नेहयुक्त नस्य.

–**फल**–न., स्नेहयुक्तं फलं तिलैरण्डातसीबिभीतकादिकम् ( सुचि. ५.७ )
स्नेहयुक्त फळ. तीळ एरंड इत्यादी.

**स्नैहिकवर्ति**–स्त्री., वर्ति० धूमपाने उपयुक्ता स्नेहनकारिका स्नेहयुक्ता वर्तिः ( चसू. ५.२६)
स्नेहन करणारी, स्नेहयुक्त धूम्रपानाला उपयुक्त वातकांडी इ०

**स्पन्द्**–पु., रोगलक्षण० कम्पः (असंशा. ८.३२)
कंप, स्पंदन, थरथरणे, कापरे.

**स्पन्दन**–न., रोगलक्षण० चलनम् (ड. सुशा. १.१९)
सपीडनगतिः (परिव०) (र. २२. १०१ )
कंप, थरथरणे. पीडायुक्त गति. कापरे.
वनस्पति० ( असंउ. ६ ) एक वनस्पती.
वि., कम्पनः ( चसू. १८.७ ) कंपन, कापरे.

**स्पर्श**–., गुण० वायवीयगुण० ( चशा. ७.१६ )
स्पर्शनेन्द्रियग्राह्यगुणः यथा उष्णादिः (चसू.८.११)
उष्णशीतादिस्वरूपः ( सुशा. १.४ )
वायु महाभूताचा गुण. स्पर्शनेंद्रियाने कळणारा गुण. जसे उष्ण, थंड इत्यादी.

–**तन्मात्र**–न., पञ्चतन्मात्रेष्वेकम्, अनुद्भूतः स्पर्शः
( सुशा. १.४ )
पंचतन्मात्रांतील एक. बाह्येंद्रियांना अग्राह्य असा अव्यक्त स्पर्श. केवळ योग्यांनाच ग्राह्य इतका सूक्ष्म स्पर्श.

–**रुज्**–स्त्री., लक्षण० स्पर्शासहत्वम्, स्पर्शनं न सहते इति ( चचि. १२.१३ )
स्पर्श सहन न होणे. स्पर्शासहत्व.

–**लज्जा**–स्त्री., वनस्पति० लज्जालुः ( रा. ५.१६० )
लाजाळू.

–**वात**–पु., रोग० अस्मिन्नङ्गानां तोदनं प्रायशो दाहः स्पर्शाज्ञत्वं मण्डलानि च त्वगुपरि दृश्यन्ते
( र. २१.१३ )

एक रोग, यात टोचणी, बहुधा दाह स्पर्श न कळणे व त्वचेवर मंडले–चकंदळे दिसतात.

**–वातारि**–पु., पारदयोग० **असौ स्पर्शवातविनाशनः** ( र. २१.३९-४० )
पाऱ्याचा योग. स्पर्शवातरोग नाशक.

**–विकार**–पु., रोग० **स्पर्शवातः** ( र. २१.२२ )
स्पर्शवात.

**–वैगुण्य**–न., लक्षण० **स्पर्शाज्ञत्वम् स्पर्शहानिः** ( सुसू. १५.११ )
स्पर्श न कळणे, स्पर्शहानि, सूनबहिरी.

**–शीत**–वि., **स्पर्शे शीतः** ( असंसू. ७.१८ )
स्पर्शाला थंड.

**–संकोचपर्णिका**–स्त्री., वनस्पति० **लज्जालुः** ( ध. ४.१०९ )
लाजाळू.

**–हानि**–स्त्री., गुह्यरोग० **शूकदूषितरक्तोत्था, शूकेन दूषितं यन्मेढ्रे रक्तं तदुद्भवेयम्, अचेतनत्वं मेढ्रे जायते** ( इन्दु. सुनि. १४.१०, असंउ. ३८ )
लिंग मोठे करण्याच्या चुकीच्या उपचारांनी रक्त दूषित होऊन लिंगावर अनिष्ट परिणाम होतो. लिंगात चेतना राहत नाही.

**–हिम**–वि., **स्पर्शे शीतम्** ( असंसू. ७.२४१ )
स्पर्शाला थंड.

**स्पर्शन**–न., शारीर० **स्पृशत्यनेनेति** ( चक्र. चसू. ८.८ )
**स्पर्शनेन्द्रियम्** ( चशा. ७.१६ )
स्पर्शनेन्द्रिय ज्याच्याने स्पर्श कळतो ते इंद्रिय.
**स्पर्शक्रिया** ( चचि. २९.१२८ ) स्पर्शाची क्रिया.

**–घ्न**–वि., **स्पर्शनेन्द्रियं हन्तीति (कुष्ठम्)** (चचि. ७.३)
स्पर्शनाशक. स्पर्शनेन्द्रिय नष्ट करणारे ( कुष्ठ )

**स्पर्शनेन्द्रिय**–न., शारीर० **त्वक्, स्पर्शेन्द्रियम्** ( अहृसू. १२.१ )
त्वचा, स्पर्शनेंद्रिय, स्पर्शाचे ज्ञान ग्रहण करणारे.

**स्पर्शाज्ञान**–न., रोगलक्षण० **स्पर्शासंवेदनम्, स्पर्शस्यासंवित्तिः** ( सुशा. ६.२६ )
स्पर्शाचे अज्ञान. स्पर्शज्ञान नसणे.

**स्पर्शासहत्व**–न., लक्षण० **स्पर्शस्यासहत्वम्** ( सुनि. १५.६ )
स्पर्श सहन न होणे.

**स्पर्शेन्द्रिय**–न., शारीर० **त्वगिन्द्रियम्, पञ्चज्ञानेन्द्रियेष्वेकम्, त्वक्, इदं वायवीयमिन्द्रियम्** ( सुशा. १.१९ )
त्वचा, त्वगिंद्रिय. पाच ज्ञानेंद्रियांतील एक, हे वात महाभूताचे.

**स्पर्शोद्विग्नत्व**–न., लक्षण० **स्पर्शासहत्वम्** (सुनि. १.४५)
स्पर्श सहन न होणे, स्पर्शद्वेष, स्पर्श नकोसा होणे.

**स्पृक्का**–स्त्री., वनस्पति० **सुगन्धिद्रव्य०** ( चचि. २३.७७; सुसू. ३८.२४-२५ ) **तद्गुणाः— कटुः, कषाया, तिक्ता, शीता, सुगन्धिः, कफनाशिनी, तृष्णाविषदाहकुष्ठदुर्गन्धस्वेदकासाश्मरीमूत्रकृच्छ्रप्रमेहनाशिनी च** ( ध. ३.६२; रा. १२.११३-१५; अहृसू. १५.४३ )
हिं.— असवरग.
**म.— स्पृक्का, शाक.**
**बं.**— पिडिडशाक.
सुगंधी द्रव्य. पिंडिका.
गुण— तिखट, तुरट, कडु, थंड, सुगंधी, कफनाशक, तहान, विष, दाह, कुष्ठ. दुर्गंध, घाम, खोकला मूतखडा, लघ्वीला त्रास होणे, प्रमेह नाशक.
**सुगन्धशाक०** ( भाप्र; र. २८.८६ )
एक सुगंधी भाजी.
**लज्जालुः** ( रा. ५.१५९ ) लाजाळू.

**स्पृक्शरीर**–न., **भोगायतनं शरीरम्, ' नित्यमात्मानं स्पृशति इति स्पृक्; शरीरमातिवाहिकं शरीरम् ' तादृक् स्पृक्शरीरम् इति चक्रः** ( चशा. ३.१३ )
स्पर्शनेंद्रिय व्याप्त शरीर, आत्म्याला स्पर्श करणारे, भोग भोगण्याचे साधन शरीर ( लिंगदेह, सूक्ष्म शरीर).

**स्पृष्टरोदिका**–स्त्री., वनस्पति० **लज्जालुः** ( असंउ. २ )
लाजाळू.

**स्प्रष्टृ**–पु., वि., **स्पर्शनेन्द्रियस्य स्पर्शबोधहेतुः, स्पर्शज्ञापककर्ता** ( सुशा. ३.४ )
स्पर्शनेंद्रियाचा स्पर्श कळण्याचा हेतु. स्पर्शज्ञान करविणारा (आत्मा).

**स्फटिक**–पु., **खनिजद्रव्य०** **रत्न०** ( चचि. १.४ )२२ )
**तद्गुणाः–चक्षुष्यः, शीतो लेखनो विषसूदनः, पवित्रो धारणीयः, पाप्माऽलक्ष्मीमलापहः** ( सुसू. ४६.३२९-३३० )
खाणीतला पदार्थ–गुण–डोळ्याला हितकर, थंड, दोष खरडून काढणारा, विषनाशक, पवित्र, धारण-करण्यास योग्य, पाप, अवकळा व मलनाशक,

सौराष्ट्री ( र. २.१४९ ) तुरटी.
श्वेतपाषाणः ( र. २.१४९ )
पांढरा पाषाण, स्फटिक.
वनस्पति० निर्यास० कर्पूरः ( ध. ३.३१ ) कापूर.

**( स्फटिका )**–स्त्री., खनिजद्रव्य० सौराष्ट्री०
( र. २३.४७-४८ )
तुरटी.

**–पात्र**–न., स्फटिकमयभाजन० रागषाडवसट्टकादिधारणार्थमिदमुपयुज्यते ( सुसू. ४६.४५३ )
स्फटिकाचे भांडे. कोशिंबिरी रायती इत्यादींकरिता.

**स्फटिकाभ**–वि., स्फटिकवर्णयुक्तम्, श्वेतम्
( सुशा. २.११-१२ )
स्फटिक मण्यासारख्या वर्णाचे. पांढरे शुभ्र.

**स्फाटिक**–न., स्फटिकस्येदम् ( चूर्णम् )
( सुउ. १०.१५ )
स्फटिकासारखे, स्फटिकाचे.

**स्फिच्**–स्त्री., शारीर० नितम्बः, कट्याः पश्चिमो मांसलो भागः ( सुशा. ३.८ ) षट्पञ्चाशत्प्रत्यङ्गेष्वेकोऽवयव० संख्यातो द्वौ स्फिचौ ( चशा. ७.११ )
ढुंगण. कंबरेचा मागचा मांसल भाग. ५६ प्रत्यंगांतील एक अवयव. दोन ढुंगणे; कुल्ले.

**( स्फिक् ) शूल**–पु., लक्षण० स्फिग्भागस्य शूलः
( चसि. २.१६ )
ढुंगणात होणारा शूल.

**–शोष**–पु., लक्षण० स्फिग्भागस्य शोषः
( चसि. २. १६ )
ढुंगण सुकणे.

**–स्तम्भ**–पु., लक्षण० स्फिग्भागस्य स्तम्भः
( चसि. २.१६ )
ढुंगण दडस होणे, ताठणे, जखडणे.

**स्फुट**–वि., अभिव्यक्तं, विकसितम्
( सुसू. ४५.१९३-१९४ )
स्पष्ट झालेले, अभिव्यक्त, सर्वांना समजणारे, विकसित.

**–फल**–पु., वनस्पति० तुम्बरुः ( रा. ११.६६ )
रानकोथिंबीर.

**–स्रोतस्कर**–न., स्रोतःशुद्धिकरम् (मद्यं) स्फुटं निर्मलं शुद्धं वा, तथाविधं स्रोतः करोति इति स्फुट स्रोतस्करम् नाम स्रोतोवैमल्यकरम्
(सुसू.४५.१९३-१९४) स्रोतसांची शुद्धी करणारे.

**–स्रोतोमुख**–वि., विकसितस्रोतोमुखः
( असंसू. २८.२६ )
स्रोतसांची तोंडे खुली झालेला.

**स्फुटन**–न., लक्षण० स्फुटितवद् वेदना (चसू. १७.५८)
फोडल्याप्रमाणे वेदना.
दरणम् ( चसू. ५.९२ ) फाटणे.

**स्फुटिका**–स्त्री., खनिजद्रव्य० सौराष्ट्री
( र. २९.१०२-१०४ )
तुरटी.

**स्फुटित**–वि., बहुधाखण्डीभूतम् ( सुसू. ४५.११२ ) विदीर्णम् ( सुनि. १६.३७ ) भिन्नम्, स्तोकम् ( अस्थिभङ्गप्रकारः ) ( सुनि. १५.१० )
तुकडे तुकडे झालेले, अनेक तुकडे झालेले, फुटलेले, थोडे.

**–दन्तता**–स्त्री., दन्तविकृति० अस्मिन् विकारे सस्फोटो दन्तो भवति ( कासू., २०.६ )
दाताची विकृति. फुटलेला दात असणे.

**स्फुरण**–न., लक्षण० स्पन्दनम्, कम्पः ( चनि. ३.७ )
पुनः पुनः चलनम् ( सुचि. १.७ )
स्पंदन, कंप, पुनः पुन्हा हालणे.

**स्फूर्ज**–पु., वनस्पति० तिन्दुकः ( सुचि. ५.१८ )
टेंभुरणी, टेंभुर.
टिण्डुकः ( असंचि. २३ ) टेंटु.

**स्फूर्जक**–पु., न., वनस्पति० तिन्दुकः ( चवि. ८.१४४: ध. ५.४० ) लकुचाकारपत्रकाण्डः, स्योनाकः
( सुउ. ३९.१८६ )
टेंभुरणी, टेंभुर. ओटीच्या फलवृक्षाप्रमाणे आकार पाने व कांडी असलेला वृक्ष; टेंटु.

**स्फूर्जथु**–पु., वनस्पति० तण्डुलीयकः ( रा. ५.१७५ )
तांदुळजा.

**स्फूर्जन**–पु., वनस्पति० तिन्दुकः ( ध. ५.४० )
टेंभुरणी, टेंभुर.

**स्फूर्जात**–न., वनस्पति० काकतिक्तः
( इन्दु. असंचि. १.७७ )
सागरगोटा, कावळी.

**स्फोट**–पु., लक्षण० स्फुटनम् ( यथा त्वचः )
( सुनि. ५.२४ )
फुटणे, जसे हातपाय फुटणे.
त्वग्रोग० ( चसू. १३.३५; अहृसू. ७.१९ )
त्वचेचा रोग. त्वचा फाटणे. ( हातापायाची त्वचा फाटणे)

विस्फोटः ( ३.७९ ) फोड. फोड येणे.

**-बीजक**-पु., वनस्पति० **भल्लातकः** ( रा. ११.२०१ )
बिब्बा.

**-लता**-स्त्री., वनस्पति० **कर्णस्फोटा** ( रापरि. ३.४१ )
कानफोडी. तिळवण.

**-शुक्तिज**-न., भैषज्यद्रव्य० **मौक्तिकम्** (ध. ६.६२ )
मोती.

**स्फोटन**-न., रोगलक्षण० **शकलीकरणमिव वेदना** ( सुउ. ४३.६ )
तुकडे होत आहेत अशी वेदना.

**स्मय**-पु., ( परिव० ) **विस्मयः** ( चइ. ११.१८ )
विस्मय, आश्चर्य.

**स्मर**-पु., **कामदेवो मदनः** ( र. ५.१२ )
कामदेव, मदन.

**-वृद्धि**-स्त्री., वनस्पति० **कामवृद्धिः** ( रापरि. ४.५१)
कामवृद्धि. विषयवासनेची वाढ.

**स्मराधिवास**-पु., वनस्पति० **अशोकः** ( रा. १०.२७१ )
अशोक.

**स्मराम्र**-पु., वनस्पति० **राजाम्रः** ( रा. ११.८ )
उत्कृष्ट आंबा.

**स्मृति**-स्त्री., **स्मरणम्, स्मरणशक्तिः** ( चसू. १२.४३ ) **प्रज्ञाभेदः** ( चशा. १.९८ ) **भूतार्थविज्ञानम्** ( सुउ. ६१.३ ) **अनुभवजन्यं ज्ञानं स्मृतिः, पूर्वानुभूतस्यार्थस्य स्मरणम्, 'अनुभूतार्थासंप्रमोषः स्मृतिः' इति योगसूत्रमपि अत्रानुसन्धेयम्** (सुशा. १.१७) **स्मृतिशास्त्रजं ज्ञानम्** ( चवि. ४.४ )
स्मरण, स्मरणशक्ति. बुद्धीचा एक प्रकार, अनुभवजन्य ज्ञान. पूर्वी अनुभवलेल्या ज्ञानाचे व्यक्तीकरण- स्मरण. भूतांचे अर्थविज्ञान. स्मृतिशास्त्रातील ज्ञान. गणित शास्त्र विज्ञान.

**-कर**-वि., **स्मरणकारकम्** ( अहृसू. १४.२८ )
स्मरणकारक.

**-भ्रंश**-पु., लक्षण० **स्मरणशक्तिभ्रष्टत्वम्, कार्याकार्यविचाराभावः** ( चशा. १.१०१ ) **(अत्र स्मृतिविभ्रंशपदमस्ति न केवलं स्मृतिभ्रंश इति** ( असंनि. ६.११ )
स्मरणशक्तीचा नाश. कार्याकार्यविचाराचा अभाव.

**-विभ्रंश**-पु., लक्षण० **कार्याकार्यविचाराभावः, स्मृतिभ्रंशः** ( असंनि. ६.११ )
कार्याकार्यविचाराचा अभाव. स्मृतीचा भ्रंश. आठवण कमी होणे.

**स्यन्द्**-पु., रोगलक्षण० **श्लेष्मस्रवणम्** ( सुसू. ४६.४४१-४४२ ) **सर्वोर्ध्वजत्रुगस्रोतः स्यन्दनात् स्यन्दः** ( असंउ. १९ )
कफस्राव. मानेच्या वरच्या सर्व स्रोतसातून होणारा-स्राव म्हणजे स्यंद.
**नेत्ररोग०** ( सुउ. १.३०-३१ )
डोळ्याचा विकार. डोळे येणे.

**स्यन्दन**-पु., वनस्पति० **तिन्दुकः** ( चवि. ८.१४४; ध. ५.४० ) टेंभुरणी, टेंभुर.
**तिनिशः** ( चसू. २५.४९; रापरि. ९.२४ ) तिवस.
**नेमिवृक्षः** ( चक्र. चचि. ३.२५८ ) पांढरा खैर.
**रथः** ( सुसू. ३.५३ ) रथ.

**-तैल**-न., सिद्धतैल० **दोषाणां स्रावकं तैलम्, भगन्दरे शोधनरोपणसवर्णीकरणार्थमुपयुज्यते** ( सुचि. ८.५१-५२ )
दोषांचा स्राव करणारे तेल. भगंदर विकारात व्रणाचे शोधन करून व्रण भरून आणण्यासाठी व त्वचेचा रंग पूर्वीप्रमाणे होण्यासाठी उपयुक्त.

**स्यूत**-वि., **सीवनकर्मकृतम्** ( असंसू. ३८.३९ )
शिवण्याचे कर्म केलेले.

**स्योनाक**-पु., वनस्पति० **टिण्टुकः** (चचि.१५.१३४-३७; असंउ. ३५; ध. १.११४ ) **तद्गुणाः-कटुरुष्णः अम्लः, दीपनपाचनः हृद्यः रुच्यः, आमवातातीसारकासारुचिबस्तिरोगादिनाशनः** ( ध. १.११४ )
टेंटु. **गुण**- तिखट, आंबट, उष्ण, दीपक, पाचक हृदयाला हितकर, रुचीला हितकर, आमवात, अतिसार, खोकला, अरुची, बस्तिगत रोगादिकांचा नाशक.

**स्रंस**-पु., **किञ्चित्स्वस्थानचलनम्** ( चसू. २०.१२ ) **हन्वादेः सन्धेर्भ्रंशः ( अरुः ) शैथिल्यम्** ( हे. अहृसू. १२.४९ )
स्वतःच्या स्थानापासून थोडे ढळणे. हनुवटी इत्यादी संधी ढळणे, शैथिल्य. शिथिलता.

**स्रंसन**-न., **च्यवनम्, मलरेचनम्** ( चचि. ३.१७१-७२) **मृदु रेचनम्** ( सुउ. ४२.५६-५७; चसू. १३.७७ ) **द्र० ' विरेचन '**
ढळणे. मळाचे रेच होणे. सौम्य रेचक.

**स्रंसिन्**-पु., वनस्पति० **पूगफलम्** ( ध. ३.३९ ) सुपारी.

**स्रज्**-स्त्री., पुष्पमाला ( ड. सुक. १.२६ )
फुलांची माळ.

**स्रव**-पु., वनस्पति० लता० मूर्वा ( र. २०.१०१ )
मोरवेल.

( **स्रवा** )-स्त्री., वनस्पति० लता० मूर्वा ( र. २०.१०१ )
मोरवेल.

**स्रवण**-न., लक्षण० लालादीनां स्रावः ( चनि. ७.७(३) )
लाळ इत्यादिकांचा स्राव होणे.

**स्रवत्तोया**-स्त्री., वनस्पति० रुदन्ती ( रापरि. ५.१५ )
रुद्रवंती. रानहरबरा.

**स्रवन्ती**-स्त्री., नदी ( असंशा. १२.८ ) नदी.

**स्रष्टृ**-पु., वि., कर्ता, चेतनावान् ( सुशा. ३.४ )
करणारा, कर्ता, ज्ञानवान.

**स्रस्त**-वि., भ्रष्टम् ( चचि. ३०.१११-१२ ) अवसन्नम् शिथिलम् ( सुउ. ४१.१८-२१ )
ढळलेला, निखळलेला, भ्रष्ट, ओसरलेला, ढिला.

**-कुक्षि**-वि., स्रस्तः सन्धिबन्धेभ्यः शिथिलीभूतः कुक्षिः यस्याः सा ( सुशा. ३.७-८ )
संधिबंधनापासून ढळलेली कूस जिची ती.

**-गुद**-न., लक्षण० शिथिलगुदम् ( चचि. १९.९ )
ढिले गुद. स्थानभ्रष्ट गुद. बाहेर येणारे गुद.

**-पायु**-पु., लक्षण० शिथिलगुदम्, स्रस्तगुदम् ( असंशा. ११.१६ )
ढिले गुद. स्थान भ्रष्ट गुद. बाहेर येणारे गुद.

**-पिण्डिका**-स्त्री., लक्षण० शिथिलपिण्डिका ( सुसू. ३२.४ )
ढिली पिंढरी. थलथल हालणारी पिंढरी.

**-मुष्क**-वि., लक्षण० स्थानच्युताण्डः ( सुसू. ३२.४ )
मूळच्या स्थानातून सुटलेले-ढळलेले अंड.

**-मूर्धजा**-वि., शिथिलीभूताः केशा यस्याः, सा ( सुशा ३.७-८ ) जिचे केश ढिले झाले आहेत अशी.

**स्रस्ताक्ष**-वि., अतिपतितनयनः (सुचि.५.१८) शिथिलीभूतमक्षि नाम नेत्रं यस्य, सः ( सुशा. ३.७-८ )
ढिले डोळे असलेला. डोळे पडलेला.

**स्रस्ताङ्गता**-स्त्री., लक्षण० निःसहावयवता, शरीरशैथिल्यम् ( चचि. ३.१०३-१०५ ) ( सुसू. २५-३४,३५ )
शरीर ढिले असणे.

**स्रस्तापान**- वि., अधश्च्युतगुदः ( ड. सुउ. ४०.९ )
बाहेर आलेले-येणारे गुद, गुदभ्रंश असलेला.

**स्राव**-पु., नेत्ररोग० नेत्रस्रावः ( चसू. २०.१५, सुउ. २.५-७ )
डोळ्यातून होणारा स्राव.
नासागतरोग० नासास्रावः ( असंउ. २३ )
नाकातून होणारा स्राव.
लक्षण० स्रवणम् ( असंउ. २९ ) स्राव होणे.

**-गति**-स्त्री., स्रावमार्गः ( सुचि. ८ २४. )
स्रावाचा मार्ग.

**-स्रावण**-न., रोग० स्राव, नासास्रावः ( सुसू. ४२.९ )
स्राव. नाकातील स्राव.
रोगलक्षण० स्रावः ( सुसू. ४२.९ ) स्राव.

**स्राविन्**-वि., स्रावयुक्तः ( चचि. २५.२० ) स्रावयुक्त.

**स्राविणी** ( योनि )-स्त्री., योनिरोग० प्रदरः ( चचि. ३०.८१.८२ )
प्रदर. ( श्वेत, रक्तप्रदर. )

**स्राव्य**-वि., स्रवणयोग्यः ( सुसू. २५.१२ )
स्राव करण्यास योग्य.

**स्रुचमुख**-न., यन्त्र० स्रुचसदृशं मुखं यस्य तद्यन्त्रम् ( असंसू. ३४.१६ )
वडाच्या पानाच्या आकाराचे पळीसारखे यंत्र.

**स्रुत्**-स्त्री., स्रावः ( सुनि. १०.१२ ) स्राव.

**स्रुत**-वि., गलितः, विगतः ( असंसू. ६.७ )
गळलेला, गेलेला.

**-क्षार**-वि., गलितक्षारः ( सुनि. ६.११ )
गाळलेला क्षार.

**-दोष**-वि.,शोधनादिना निष्कासितः दोषः यस्य, सः ( पुरुषः ) ( सुचि. ९.६६ )
वमनादींनी ज्याचे दोष काढून लावले आहेत असा ( पुरुष. )

**-रक्त**-वि., गलितरक्तः ( अहृसू. २०.१२ )
रक्त गळालेला, रक्तस्राव झालेला.

**स्रुतासृक्**-वि., स्रुतरक्तः ( सुचि. ३९.३ )
रक्तस्राव झालेला.

**स्रुति**-स्त्री., लक्षण० स्रावः ( अहृसू. १२.५२ ) स्राव.

**स्रुव**-पु., पात्र० वटपत्राकारो दारुहस्तकः ( सुसू. २.४ ) चालनीसदृशं पात्रम् ( र. २८.९४-९८ )
वडाच्या पानाच्या आकाराची लाकडाची पळी चाळणीसारखे भांडे, चाळणी, रोळी.

**-द्रुम**-पु., वनस्पति० विकङ्कतः ( रा. ९.५४ )
वेहकळ.

–**वृक्ष**–पु., वनस्पति० विकङ्कतः ( असंसू. १६.११; ( अहसू. १५.१७ )

वेहकळ.

**स्रुवानन**–वि., स्रुवस्येवाननं यस्य तद् ( कर्णशोधन-शलाकायन्त्रम् ) ( अरु. अहसू. २५.३५ )

वडाच्या पानासारख्या तोंडाचे यंत्र. कान कोरणे.

**स्रोतनदीभव**–न., खनिजद्रव्य० स्रोतोञ्जनम् ( रा. १३.२२६ )

स्रोतोंजन, एक सुरमा.

**स्रोतस्**–न., स्थूलो वा सूक्ष्मो वा मार्गः छिद्रं वा ( सुशा. ४.५९ )

स्थूल किंवा सूक्ष्म मार्ग. छिद्र.

शारीर० स्रोतांसि द्विविधानि बहिर्मुखान्यन्तर्मुखानि च। तत्रान्तर्मुखान्येव योगवहानि स्रोतांसि, श्रवणनयनवदनघ्राणगुदमेढ्राणि नव स्रोतांसि बहिर्मुखानि नराणां। स्त्रीणां च एतान्येवापराणि च त्रीणि द्वे स्तनयोरधस्ताद्रक्तवहं च (सुशा. ५.१०) स्रोतसां स्वरूपम्–स्रवणात् स्रोतांसि। स्रवणादिति रसादेः पोष्यस्य स्रवणात् ( चसू. ३०.१२ ) स्रोतांसि खलु परिणाममापद्यमानानां धातूनामभिवाहीनि भवन्ति अयनार्थेन। सर्वे हि भावाः पुरुषे नान्तरेण स्रोतांस्यभिनिर्वर्तन्ते। क्षयं वाऽप्यभिगच्छन्ति ( चवि. ५.३ ) मूलात्खात् यद् देहे प्रसृतमन्तरं यच्चाभिवाहि सिराधमनीवर्जितं च तत्स्रोतः इति विज्ञेयम् ( सुशा. ९.१३ ) स्वधातुसमवर्णानि वृत्तानि स्थूलान्यणूनि आकृत्या च प्रतानसदृशानि दीर्घाणि च स्रोतांसि सन्ति (चवि. ५.२५) स्रोतसां संख्या प्रकाराश्च–यावन्तः पुरुषे मूर्तिमन्तो भावविशेषास्तावन्त एवास्मिन्स्रोतसां प्रकारविशेषाः। अतिबहुत्वात्केचिदपरिसंख्येयानि स्रोतांस्याचक्षते, परिसंख्येयानि पुनरन्ये ( चवि. ५.४ ) तद्यथा–प्राणोदकान्नरसरुधिरमांसमेदोऽस्थिमज्जशुक्रमूत्रपुरीषस्वेदवहानीति। वातपित्तश्लेष्मणां पुनः सर्वशरीरचराणां सर्वाणि स्रोतांस्ययनभूतानि ( चवि. ५.७ ) शल्यतन्त्रे तु स्रोतांस्येकादशैव, तानि पुनः प्राणान्नोदकरसरक्तमांसमेदोमूत्रपुरीषशुक्रार्तववहानि, येष्वधिकारः शल्यतन्त्रे ( सुशा. ९.१२ )

शल्यतन्त्रे तु अस्थिमज्जस्वेदवहानां स्रोतसां नोल्लेखः। अत्र डल्हणः– "अस्थिमज्जस्वेदवाहिषु स्रोतस्सु सत्स्वप्यनधिकारः। कथम्? तत्रास्थिवहानां सकलानामेव मेदो मूलं मज्जवहानां च। तेषां सकलान्येवास्थीनि सकलशरीरगतानि, न च सकलशरीरगतविद्धलक्षणं साध्यादिज्ञाननिश्चायकम्। एवं स्वेदवहानामपि केवलं मेदो मूलमिति। अतः शल्यतन्त्रे तेषां मूलविद्धलक्षणानधिकारः। अमुमेवार्थं चेतसि कृत्वाऽऽह येष्वधिकार इति" (ड. सुश. ९.१२) स्रोतसां दुष्टिकारणम्–सामान्येन-सर्वेषामेव स्रोतसां वातपित्तश्लेष्माणः प्रदुष्टाः दूषयितारो भवन्ति, दोषस्वभावात् ( चवि. ५.९ ) यः आहारो विहारश्च दोषगुणैः समः धातुभिर्विगुणश्च, सः स्रोतसां प्रदूषकः ( चवि. ५.२३ ) स्रोतसां दुष्टिलक्षणे सामान्येन–अतिप्रवृत्तिः संगो वा सिराणां ग्रन्थयोऽपि वा विमार्गगमनं च ( चवि. ५.२४ ) स्रोतोवेधचिकित्सा-स्रोतोविद्धं तु प्रत्याख्यायोपचरेत्। उद्धृतशल्यं क्षतविधानेनोपचरेत्। ( सुशा. ९.१२ ) कायचिकित्सायां तु स्रोतोरोध एव प्राधान्येन रोगाणां कारणम्। तत्र स्रोतोमुखविशोधनात् दोषाः कोष्ठं यान्ति अनन्तरं यथासन्नं विनिर्हरेत्। एषा शोधनचिकित्सा ( चसू. २८.५ )

शरिरातील स्थूल वा सूक्ष्म मार्ग. हे दोन प्रकारचे–अंतर्मुख व बहिर्मुख. अंतर्मुख स्रोतसे प्राण, उदक इत्यादी योगवाही होत. कान, डोळे, तोंड, नाक, गुद, शिश्न ही नऊ स्रोतसे बहिर्मुख होत. स्त्रीला ही असून शिवाय दुसरी तीन आहेत. दोन स्तनात व एक खाली रजोवह. स्रोतसांचे स्वरूप–स्रवणात् स्रोतांसि स्रवणात् म्हणजे रसादि पोषक धातूंच्या स्रवणामुळे. स्रोतसे खरोखर परिणाम म्हणजे पचनाने रूपांतर पावत असलेल्या धातूंचे मार्ग म्हणून सर्वत्र वहन करणारी असतात. पुरुषातील सर्व भाव स्रोतसांवाचून उत्पन्न होऊ शकत नाहीत, किंवा क्षय ही पावत नाहीत, मुळात असलेल्या हृदयासारख्या पोकळीतून शरिरात जे अवकाश युक्त ( पोकळी ) पसरते व जे वाहून नेण्याचे कार्य करिते पण शीर व धमनी नसलेले त्याला स्रोतस म्हणतात. ज्या धातूचे वहन करते त्या स्वतःच्या धातूच्या वर्णाचे वाटोळे, जाड, बारीक दोन्ही प्रकारचे वेलीच्या तंतूसारखे लांब असते. **संख्या**—शरिरात (पुरुषांत) जितके मूर्ति ( आकार ) युक्त निरनिराळे भाव आहेत तितके प्रकार स्रोतसांचे आहेत. दोनमते– काही

( स्रोतसे अतिशय असल्याने ) अगणित मानतात, व काही गणती करण्याइतकी मानतात. जसे ( १ ) प्राण ( २ ) उदक ( ३ ) अन्न ( ४ ) रस ( ५ ) रक्त ( ६ ) मांस ( ७ ) मेद ( ८ ) अस्थि ( ९ ) मज्जा ( १० ) शुक्र ( ११ ) मूत्र ( १२ ) मळ ( १३ ) घामवाहक स्रोतसे. सर्व शरिरात संचार करणाऱ्या वातपित्तकफांची सर्व स्रोतसे संचाराचा मार्ग म्हणून आहेत. शल्यतंत्रात ११ च स्रोतसे सांगितली आहेत. वरील स्रोतसांपैकी अस्थि मज्जा व घाम यांची स्रोतसे असून ही सांगितली नाहीत. शल्यतंत्रात या स्रोतसांच्या ज्ञानाची आवश्यकता नाही. अस्थि आणि मज्जावह स्रोतसांचे मूळ मेद आहे. त्यांपैकी सर्व अस्थि सर्व देहभर आहेत.

यांच्या मूलविद्ध लक्षणाचा साध्यादिज्ञाननिश्चय करण्याच्या दृष्टीने उपयोग नाही. त्याच प्रमाणे स्वेदवह स्रोतसांचेही मेद हे मूळ आहे. म्हणून शल्यतंत्रात त्याबद्दल विचार करण्याचे कारण नाही. **स्रोतसांच्या दुष्टीचे कारण**— दुष्ट वात पित्त-कफ होत. जो आहार-विहार दोषगुणांशी समान व धातूंशी विरोधी गुणांचा असतो तो स्रोतसांची दुष्टि करतो. **लक्षणे**— स्रोतसात दोषमल संचित होऊन ती तुंबणे किंवा अतिप्रमाणात दोषमल बाहेर जाणे शिरांच्या गाठी होणे दोष व मल स्रोतसात विरुद्ध दिशेने जाऊ लागणे. **उपचार**— स्रोतसे कापली गेली तर असाध्य आहे असे स्पष्ट सांगून उपचार करावेत, रुतलेले शल्य काढून जखमेची चिकित्सा करावी. कायचिकित्सा शास्त्रात स्रोतसांचा रोध हेच प्राधान्याने रोगांचे कारण मानले आहे. स्रोतसांच्या तोंडाची शुध्दी करावी म्हणजे दोष कोठ्यात येतात, नंतर कोठ्यात ज्या ठिकाणी ते असतील त्या स्थानाला अनुसरून वामक किंवा रेचक इत्यादी देऊन ते बाहेर काढून शोधन करावे.

**( स्रोतो- ) ज**–न., **खनिज० अञ्जन० स्रोतोञ्जनम्** ( चक्र. चचि. २०.२९; ध. ३.१५१; पृ. १२५ ) स्रोतोंजन, सुरमा.

**अञ्जनम्** ( सुनि. १०.५ ) काजळ, सुरमा.

**–मार्दवकृत्**–वि., **स्रोतसां मृदुताकारी ( मण्डः )** ( अहृसू. ६.२८ )
स्रोतसे मृदु करणारा. मंड, पेया.

**–मुख**–न., **शारीर० स्रोतसो मुखम्** (चसू. २८.३३)
स्रोतसाचे मुख, तोंड, दार.

**–रोधस्**–न., **रोग० स्रोतसां रोधजनितो रोगः, रसप्रदोषजरोगेष्वेकः** ( चसू. २८.१०; ( अहृसू. १३.२३ )
स्रोतसांचा रोध, स्रोतसे बंद होणे. सोतसांचा रोध झाल्याने झालेला रोग. रसाची दुष्टी झाल्याने होणाऱ्या रोगांतील एक.

**–लीन**–वि., **स्रोतोगतम्** ( अहृसू. १७.२९ )
स्रोतसात गेलेले, स्रोतसात असलेले.

**–वर्त्मन्**–न., **शारीर० स्रोतोमुखम्** ( सुशा. ४.२४ )
स्रोतसांचा मार्ग, तोंड.

**–विद्ध**–वि., **यस्य स्रोतोऽवयवविशेषो विद्धः, सः स्रोतसि विद्ध इति वा** ( सुशा. ९.१२ )
ज्याचे स्रोतस विध्द झाले आहे, कापले-ठेचले गेले आहे असा.

**–विबन्ध**–पु., **लक्षण० स्रोतसां बन्धः, स्रोतोऽवरोधः** ( अहृसू. १०.६ )
स्रोतसांचा अवरोध. स्रोतसातला बंध-अडथळा.

**–विमान**–न., **अध्यायसंज्ञा०** ( चवि. ५.१ )
अध्यायाचे नाव, यात स्रोतसांची माहिती आहे.

**–विशोधन**–न., **स्रोतसां शोधनम्** (अहृसू. ५.६४)
स्रोतसांची शुद्धि. शुद्ध करणे.

**स्रोतोञ्जन**–न., **खनिज०** ( सुचि. २४.१८ ) **अञ्जन० पर्णसानद्यां सिन्धुनदे च भवति** ( ड. ) **तल्लक्षणम्– वल्मीकशिखराकारम्** ( सुउ. ६०.४९ ) **भङ्गे कृते सति नीलकमलाभं वर्तते, घृष्टे सति गैरिकच्छायं वर्तते** ( र. ३.११६ ) **सिन्धुसंभवं स्रोतोञ्जनं विशुद्धं श्रेष्ठं चास्ति। तद्गुणाः– कटु, कषायम्; मधुरम्** ( र. ३.१११ ) **शीतम्; स्निग्धं, लेखनम्** ( र. ) **स्तनवृद्धिकरणम्; नेत्र्यम्** ( र. ) **कृमिनाशनम्** ( रा. १३.२२६-२७; पृ. १२७ ) **दाहकण्डूमलघ्नं, दृष्टिक्लेदरुजापहम्** ( सुचि. २४.१८-१९ ) **हिध्मा-विषच्छर्द्यस्ररोगनुच्च** ( र. )
स्रोतोंजन, एक अंजन. सुरमा. हे पर्णसानदी व सिंधुनदात होते. वारुळाच्या शिखरासारखे फोडल्यावर निळ्या कमळासारखे, घासले असता गेरूची छटा देणारे. सिंधुनदातले स्रोतोंजन श्रेष्ठ. **गुण**—तिखट, तुरट, गोड, स्निग्ध, थंड, दोष खरडून काढणारे, स्तन वाढविणारे, डोळ्यास हितकर; कृमि, दाह, खाज, मळ, डोळ्याचे पाणी, वेदना, उचकी, विष, ओकारी व रक्तरोगनाशक.

**सौवीराञ्जनम्** ( सुसू. ३८.४६ )
सौवीरांजन, सुरमा.

**स्रोतोद्भव**–न., खनिज० **स्रोतोञ्जनम्** ( रा. १३.२२६ पृ. १२७ )
स्रोतोंजन, सुरमा.

**स्वगुप्ता**–स्त्री., वनस्पति० **कपिकच्छुः** ( चचि. ११.४५; असंउ. ३७.३१८ )
खाजकुहिली.
**लज्जालुः** ( रा. ५.१६१ पृ. १५६ ) लाजाळू.

**स्वच्छ**–पु., वनस्पति० **बदरम्** (रा. ११.१५७ पृ. १८९
बोर.
न. खनिज० **विमलम्** ( धपरि. ६. ६ पृ. २८९ )
विमल. सुवर्णमाक्षिकाचा एक प्रकार. हातावर घासल्याने ज्याची काळी रेषा उमटते ते सुवर्ण माक्षिक आणि तशी रेषा उमटत नाही ते विमल.
भैषज्य० **मौक्तिकम्** (रा. १३. ६७ पृ. २१८ )
मोती.

**(स्वच्छा)**–स्त्री., वनस्पति० **श्वेतदूर्वा** ( रा. ८२.३० पृ. १६३ )
पांढरी दूर्वा.

**–धातुक**–न., खनिज० **विमलम्** (धपरि. ६.६ पृ. २८९)
विमल.

**स्वच्छन्दभैरव**–पु., ऋषि० **रसाङ्कुशभैरवप्रभृतीनामेकतमः** ( र. १-५-९ )
ऋषि. रसांकुशभैरव इत्यादींपैकी एक.
पारदादियोग० **पारदलोहभस्ममाक्षिकभस्मगन्धकहरितालहरीतकीनिर्गुण्ड्यग्निमन्थत्रिकटुटङ्कणवत्सनाभान्समभागान्निर्गुण्डीरसेन दिनैकं मुण्डीक्वाथेन च दिनैकं संमर्द्य वटिकाश्चरेत्। असौ सर्ववातान्नाशयेत्** ( र. २१.१४९-५० )
पाऱ्याचा एक योग—पारा, लोहभस्म, माक्षिकभस्म, गंधक, हरताळ, हिरडा, निर्गुंडी, अरणी, त्रिकटु, टाकणखार, बचनाग हे समभाग घेऊन निर्गुंडी रस व मुंडीचा काढा यांनी एकेक दिवस खल करून गोळ्या कराव्या. सर्ववातनाशक.

**स्वतन्त्र**–न., **स्वस्य तन्त्रम् शास्त्रमिति यावत् सुश्रुते स्वतन्त्रं नाम शल्यतन्त्रम्** ( सुशा. १.२२ )
स्वतःचे तंत्र म्हणजे शास्त्र. सुश्रुतात स्वतंत्र म्हणजे शल्यतंत्र.

**–वृत्ति**–वि., **वृत्तिर्जीवनम्, स्वतंत्र, स्वाधीनं जीवनं यस्यसः** ( चशा. ६.२४ )
ज्याचे स्वतंत्र म्हणजे स्वाधीन जीवन आहे असा.

**स्वता**–स्त्री., **ममता** ( चशा. १.३७,१५२ )
ममता, ममत्व, अहंभाव.

**स्वदेशरचित**–वि., **स्वस्मिन्-स्वस्मिन् देशे पाकक्रियासम्पादितम् (भक्ष्यादि) यस्मिन् देशे यद् भक्ष्यादि बाहुल्येनोपयुज्यते, तत्** (ड. सुउ. ५७.१२)
स्वतःच्या देशात जे भक्ष्य भोज्य इत्यादी आहाराचे पदार्थ केले जातात त्यांचा बाहुल्याने उपयोग करतात.

**स्वन**–पु., **शब्दः, ध्वनिः** (चनि. १.२१; सुसू. २९.३०,३१)
शब्द, ध्वनी.

**स्वनिताह्वय**–पु., वनस्पती० **तण्डुलीयकः** ( रा. ५.१७५; पृ. १५७ )
तांदुळजा.

**स्वनुगुप्त**–वि., **कृतरक्षाविधानम्** ( चक. चक. १.१३) **सुष्ठु अनुगुप्तम्, सुरक्षितम्** ( सुचि. २५.२६ )
सुरक्षित. कोणाला कळणार नाही असे. चांगले सांभाळून ठेवलेले.

**स्वन्त**–वि., **शोभनोऽन्तो यस्य तत्** ( **आपानम्** ) ( चचि. २४.७५ )
परिणामी सुखकर. पेय.

**स्वपत्**–वि., **स्वापयुक्तः संविशमानः, स्वापशीलः** ( चसू. १८.९; सुशा. ४.३६ )
झोप घेण्याचा स्वभाव असलेला, झोपलेला, वेदना नसलेला.

**स्वपथग**–वि., **स्वमार्गगतः** ( अहृसू. ८.५५ )
स्वतःच्या मार्गात गेलेला-असलेला.

**स्वप्न**–पु., **अवस्थाविशेषः, करणेषूपसंहृतेषु जागरितसंस्कारजः प्रत्ययः सविषयः इति वेदान्तिनः निद्रावस्थायामर्धप्रसुप्तस्य पुरुषस्य विपरीतज्ञानम्, नातिप्रसुप्तः पुरुष इन्द्रियेशेन मनसा सफलाँस्तथाऽफलान् स्वप्नाननेकधा पश्यति** ( चइ. ५.४२ ) **अतिबलैस्त्रिभिर्दोषैर्मनोवहानां स्रोतसां पूर्णत्वाद्दारुणान् स्वप्नान्दारुणे काले पश्यति** ( चइ. ५.४१ ) **स्वपतो भूतात्मा प्रभू रजोयुक्तेन मनसा पूर्वदेहानुभूतान् शुभाशुभार्थान् गृह्णाति** ( सुशा. ४.३६ ) **करणानां वैकल्ये तमसाऽभिप्रवर्धिते स्वस्वपन्नपि भूतात्मा प्रसुप्त इवोच्यते** ( सुशा. ४.३७ ) **सर्वेन्द्रियव्युपरतौ यदा विषयेभ्यो मनोऽनुपरतं तदा नानारूपं स्वप्नं प्रपश्यति य**

( असंसू. ९.५६ ) तत्प्रकाराः– दृष्टः श्रुतोऽनुभूतः प्रार्थितो कल्पितः भाविको दोषजश्चेति सप्तविधः स्वप्नः ( चइ. ५.४३ ) तत्र दृष्टः– यश्चक्षुषा जाग्रदवस्थायां किञ्चिद्वस्तुजातं दृष्ट्वा तदानीं सुप्तावस्थायां तादृशं वस्तुजातं संवित्तिरूपतयाऽनुभूयते। श्रुतः– यश्च शब्दमात्रेण वस्तुजातं श्रोत्रेन्द्रियेण गृह्यते, तदानीं सुप्तावस्थायां तादृक्संवित्तिरूपतयाऽनुभूयते । अनुभूतः–यस्तु जाग्रदवस्थायां तादृगन्तःसंवित्तिरूपतयाऽनुभूयते । प्रार्थितः– यथायथमिन्द्रियैरनुभूयते सुप्तावस्थायां यस्मिन्दृष्टे श्रुतेऽनुभूते वा यत्पूर्वं जाग्रदवस्थायां वस्तुजातं मनसाऽभ्यर्थ्यते तथैव च सुप्तावस्थायामन्तःसंवित्तिरूपतयाऽनुभूयते । कल्पितः– यस्तु षड्भिः प्रत्यक्षानुमानादिभिर्न दृष्टो नापि श्रुतो नाप्यनुभूतो दृष्टश्रुतानुभूतत्वाभावादत एव न प्रार्थितः, अपि तु केवलं मनसा यथेच्छमुत्प्रेक्ष्य यत्किञ्चनरूपाभिः कल्पनाभिस्ताभिस्ताभिः कल्पितो जाग्रदवस्थायां वस्तुजातोऽन्तःसंवित्तावुपारूढतदानीं सुप्तावस्थायां तादृगनुभूयते । भाविकः– यश्च दृष्टश्रुतादिभ्यः स्वप्नेभ्योऽन्यो विलक्षण स्वप्नो यथा दृश्यते सुप्तावस्थायामुत्तरकालं तथैव तत्स्वप्नदर्शिना नरेण तन्मुखावगततदर्थैरन्यैरपि प्रत्यक्षतो दृश्यते । दोषजः–यो वातजः पित्तजकफजो वा यथायथं दोषगुणानुरूपोऽन्तः संवित्तावनुभूयते ( अरु. अहृशा. ६.६१ ) तत्सफलाफलत्वम्–प्रथमपञ्चप्रकारकस्वप्ना अफलाः, प्रथमरात्रे दृष्टः स्वप्नोऽल्पफलो भवति । यं दृष्ट्वा न पुनः सुप्यात् स सद्यो महाफलः स्यात् । अकल्याणं स्वप्नं दृष्ट्वा यः पुनस्तत्रैव शुभाकारं सौम्यं स्वप्नं पश्येत्, तस्य शुभं फलं विद्यात् । दिवा दृष्टं सर्वं स्वप्नं तथा रात्रिदृष्टमप्यतिदीर्घमतिह्रस्वं च स्वप्नमफलं विद्यात् । भाविकं दोषजं च स्वप्नं सफलं विदुः ( अहृशा. ६.६२-६४ ) तत्र रिष्टस्वप्नाः– यः स्वप्ने श्वभिरुष्ट्रैः खरैर्वाऽपि दक्षिणां दिशां याति, स यक्ष्माणमासाद्य जीवितं विमुञ्चति । यः स्वप्ने प्रेतैः सह मद्यं पिबेत्तथा शुना कृष्येत्, स सुघोरं ज्वरमासाद्य जीवितं मुञ्चति। स्वप्ने यो लाक्षारक्ताऽम्बराभमम्बरमन्तिकात्पश्यति स रक्तपित्तमासाद्य तेनैवान्तं नीयते । स्वप्ने यो रक्तस्रग्रक्तसर्वाङ्गो रक्तवासा मुहुर्हसन् नार्या ह्रियते, स रक्तपित्तं प्राप्य सीदति । स्वप्ने यस्य हृदि दारुणा कण्टकिनी लता जायते, तं क्रूरो गुल्मोऽन्ताय विशति। स्वप्ने यस्य नग्नस्याज्यावसिक्तस्यानर्चिषं वह्निं जुह्वत उरसि पद्मानि जायन्ते, स कुष्टेन नश्यति । यस्तु स्वप्ने चण्डालैः सह बहुविधं स्नेहं पिबेत, स प्रमेहेण म्रियते । यः स्वप्ने रक्षोगणैः सह नृत्यन्नम्भसि सीदति, स भृशमुन्मादेन पीडितः परं लोकं याति । यं नरं स्वप्ने नृत्यन्तं मत्तं प्रेत आविध्य हरति, तमपस्मारपुरस्सरो मृत्युर्हरति । यो नरः स्वप्ने शष्कुलीरपूपानपि खादति प्रतिबुद्धः सन्तादृगेव छर्दयति, स न जीवति ( चइ. ५.८-४० ) यस्य स्वप्ने खरोष्ट्रमार्जारकपिशार्दूलसूकरैः शृगालैर्वा गच्छति स मृत्योर्मुखे वर्तते ( अहृशा. ६.४६ ) अशुभस्वप्नाः–स्वप्ने सूर्येन्दुग्रहणेक्षणमक्षिरोगाय भवति । सूर्याचन्द्रमसोः पातदर्शनं दृग्विनाशाय भवति । आतुरेष्वन्यान्यप्यशुभानि दृष्टभूतानि स्वप्नलक्षणानि भवंति–मूर्ध्नि वंशलतादीनां संभवः, पक्षिणां मूर्ध्नि निलयः, मुण्डता, काकगृध्राद्यैः परिवृतत्वम्, प्रेतपिशाचस्त्रीद्रविडान्ध्रगवाशनैः परिवृतत्वम्, वेत्रलतावंशतृणकण्टकसङ्कटे सङ्गः, श्वभ्रश्मशानशयनम्, पांसुभस्मनोः पतनम्, जलपङ्कादौ मज्जनम्, स्रोतसा शीघ्रेण हरणम्, नृत्यवादित्रगीतानि, रक्तस्रग्वस्त्रधारणम्, वयोऽङ्गवृद्धिरभ्यङ्गो, विवाहः श्मश्रुकर्म, पक्वान्नस्नेहमद्याशः, प्रच्छर्दनविरेचने, हिरण्यलोहयोर्लाभोऽनर्थो बन्धपराजयौ, उपानद्युगस्य नाशः, पादचर्मणोः प्रपतनम्, भृशं हर्षः, प्रकुपितैः पितृभिश्चावभर्त्सनम्, ग्रहनक्षत्रदन्तदैवतचक्षुषां पतनं विनाशो वा, पर्वतस्य भेदनम्, रक्तकुसुमे कानने पापकर्मनिवेशने प्रवेशनम्, चितान्धकारसम्बाधे जनन्यां प्रवेशनम्, प्रासादशैलादेः पातः, मत्स्येन ग्रसनम्, काषायिणामसौम्यानां नग्नानां दण्डधारिणां, रक्ताक्षाणां कृष्णानां च दर्शनमित्यशुभलक्षणानि भवन्ति स्वप्ने । स्वप्ने कृष्णा पापानना, पापाचारा दीर्घकेशनखस्तनी, विरागमाल्यवसना स्त्री दृष्टा चेत् सा कालनिशेव प्रतीयते । ( अहृशा. ६.४९-५९ ) शुभस्वप्नाः–यः स्वप्ने देवान्, द्विजान्, गोवृषभान्, जीवतः सुहृदो, नृपान्, साधून्, यशस्विनः पश्येत्, तथैवेद्धं वह्निं, स्वच्छान् जलाशयान्, कन्याः, गौरान् शुक्ल-

वस्त्रान्सुतेजसः कुमारकान्, समन्तात् रुधिरोक्षितं दीप्ततनुं राक्षसं पश्येत् यो वा छत्रादर्शविषामिषं लभते, शुक्लाः सुमनसो वस्त्रममेध्यालेपनं फलं लभते, यः शैलप्रासादफलवृक्षसिंहनरद्विपगोश्वयानान्यारोहेत्, यश्च नदह्रदोदधीन् तरेत्, यस्य वा पूर्वोत्तरेण गमनमगम्यागमनं मृतसम्बाधान्निःसृतिर्देवैः पितृभिश्चाभिनन्दनं, रोदनं पतितोत्थानं, द्विषतां चावमर्दनम् स्यात् स बह्वायुरारोग्यं वित्तमश्नुते ( अहृशा. ६. ६२-७१ )

एक अवस्था. जागृतावस्थेत इंद्रियांकडून स्वीकारलेल्या विषयांचे मनावर निरनिराळे जे जे संस्कार झालेले असतात त्यांचा त्या त्या विषयासह झोपेत येणारा जो प्रत्यय त्याला स्वप्न म्हणतात. निद्रावस्थेत अर्धवट झोप असलेल्या व्यक्तीला विपरीत होणारे ज्ञान. गाढ झोप नसताना मनुष्य इंद्रियांचा स्वामी असणाऱ्या सफल निष्फल अशी अनेक प्रकारची स्वप्ने मनाच्या द्वारे पाहतो. प्रबल तिन्ही दोषांनी मनोवह स्रोतसांची दुष्टि केल्याने संकटकाली भयानक स्वप्ने तो पाहतो. झोपेत जीवात्म प्रभू रजोदोषाने युक्त मनाने पूर्वजन्मी अनुभवलेल्या शुभाशुभ घटना पुन्हा पाहतो-अनुभवतो. इंद्रिये विकल झाली असता तमोगुण वाढून जीवात्मा झोपला नसताही झोपला आहे असे म्हणतात. सर्व इंद्रिये विषयापासून निवृत्त झाली असताही मन जेव्हा निवृत्त होत नाही तेव्हा तो नानाप्रकारची स्वप्ने पाहतो. स्वप्नाचे प्रकार ७- पाहिलेले, ऐकलेले, अनुभवलेले इच्छिलेले, ( मागितलेले ) कल्पिलेले, भावी-( पुढे घडणारे ) व दोषविकृतीने दिसणारे. १ पाहिलेले-जागेपणी पाहिलेली वस्तु झोपेत जाणिवेच्या रूपाने दिसते. २ ऐकलेले-जागेपणी ऐकलेले स्वप्नात ऐकल्याची जाणीव होते. ३ अनुभवलेले-जागृतावस्थेत त्या त्या इंद्रियांनी अनुभवलेले झोपेत जाणिवेच्या रूपाने अनुभवाला येते. (४) प्रार्थित-जागृतीत पाहिलेली, ऐकलेली, किंवा अनुभवलेली गोष्ट हवीशी मनाला वाटते, ती स्वप्नात केल्याची जाणीव होणे. कल्पित- पाहिले, ऐकले, अनुभवले नाही पण केवळ मनाने विचार करताना ज्या कल्पना जागृतावस्थेत केल्या त्यांचाच झोपेत पुन्हा अनुभव येणे. (६) भाविक-वरील स्वप्नांपेक्षा विलक्षण स्वप्न झोपेत जसे दिसते तसेच जागे झाल्यानंतर त्याने सांगितल्या प्रमाणे त्याला व दुसऱ्यांना ही तसे घडल्याचे प्रत्यंतर येते. (७) दोषज- वातज पित्तज कफज गुणानुरूप जाणिवेत अनुभवतो. **सफलत्व निष्फलत्व**—पहिली पाच निष्फल, पहिल्या रात्री दिसणारी अल्पफलांची. जे स्वप्न पाहिल्यानंतर पुन्हा झोप लागत नाही त्याचे मोठे फल असते. प्रथम अशुभ स्वप्न पाहिल्यावर पुन्हा तेथेच शुभ सौम्य स्वप्न पाहतो त्याचे शुभ फळ मिळते; दिवसा दिसणारे कोणतेही व रात्रीचे बराच वेळ चालू राहिलेले किंवा अत्यल्प काळ असणारे स्वप्न निष्फल असते. भावीसूचक व दोषज स्वप्ने खरी ठरतात. मरणदर्शक स्वप्नरूप चिन्हे खरी ठरतात. जो कुत्रा, गाढव, उंट यांवर बसून किंवा त्यांच्या सह दक्षिण दिशेला जातो, तो क्षय होऊन मरतो. जो प्रेतांबरोबर मद्य पितो, तसेच ज्याला कुत्री ओढतात तो भयंकर ताप येऊन मरतो. जो लाखेच्या लाल रंगासारखे लाल आकाश पाहतो तसेच जो स्वप्नात आपल्या गळ्यात लाल माळ, लाल सर्वशरीर, लाल पोषाख असलेल्या स्त्रीकडून हरण केला जातो तो रक्तपित्त होऊन मरतो. ज्याच्या हृदयात काटेरी त्रासदाक वेल झालेली स्वतः पाहतो त्याच्या शरिरात क्रूर प्राणनाशक गुल्म विकार प्रविष्ट होतो. स्वप्नात जो नग्नावस्थेत ज्वाला नसलेल्या अग्नीत तूप टाकीत असताना उरस्थानात कमळे उत्पन्न होतात असे पहातो तो कुष्ठाने मरतो. जो स्वप्नात चांडाळासह नानाप्रकारचे स्नेह पितो तो प्रमेहाने मरतो. जो स्वप्नात राक्षसगणांबरोबर नाचत पाण्यात पडतो तो उन्मादाने अतीशय पीडित होऊन परलोकाला जातो. स्वप्नात उन्मत्त होऊन नाचणाऱ्याला प्रेत पछाडून हरण करते त्याला मृत्यु अपस्माराला पुढे करून हरण करतो. जो मनुष्य स्वप्नात करंजी, अनारसा खातो व जागे झाल्यावर त्याला त्याचीच ओकारी होते तो जगत नाही. स्वप्नात गाढव, उंट, मांजर, माकड, वाघ, डुक्कर, यांच्या बरोबर जातो तो मृत्यूच्या जबड्यात असतो. **अशुभ स्वप्ने**-स्वप्नात सूर्य चंद्र ग्रहण पहाणे हे डोळ्याचे रोग होणार असल्याचे दर्शक आहे. चंद्र सूर्य पडताहेत हे पहाणाऱ्याची दृष्टी नष्ट होते. **रोग्याला पडणारी अशुभ स्वप्ने**—डोक्यात बांबु, वेली इत्यादी होणे; डोक्यावर पक्ष्यांचे घरटे, मुंडन केलेले डोके; कावळा गिधाड इत्यादींनी घेरणे;

प्रेतपिशाच्च, स्त्री, द्रविड, आंध्र, गोभक्षक प्राणी (वाघ इ०) यांनीही घेरणे; वेत, वेली, बांबु, गवत, काटे इत्यादींच्या जाळयात अडकणे; खळगा स्मशान यात निजणे; धूळ, भस्म यात पडणे; पाणी चिखल यात बुडणे; पाण्याच्या लोंढ्याने वाहून जाणे. वाद्ये, नृत्य गीते, लाल माळा व वस्त्रे यांचे धारण वय, अंग ही वाढलेली दिसणे; अभ्यंग, लग्न, हजामत करण्याचे दृश्य, पक्वान्न, स्नेह, मद्यप्राशन, ओकारी, रेचक होणे; सोने, लोखंड सापडणे; अनर्थ, कैद, पराजय, दोन्ही पायतणांचा नाश, पायांची कातडी पडणे; फार आनंद, रागावलेल्या वडील माणसांकडून निर्भर्त्सना, ग्रह, नक्षत्र, दात, दैवत व डोळे पडणे किंवा त्यांचा नाश. पर्वत फुटणे, लालफुलांच्या रानात व पाप्याच्या व पापकर्मे होत असलेल्या घरात प्रवेश, चिता, अंधकार व आईच्या गर्भामध्ये प्रवेश, खूप उंच इमारतीवरून किंवा पर्वत इत्यादी वरून पडणे, माशाने गिळणे, भगवी वस्त्रे ल्यालेला रागावलेल्या, नग्न दंडधारीचे लाल डोळे असलेल्या काळ्या पुरुषाचे दर्शन, हीं अति अशुभ लक्षणे होत. काळी, पापी हावभावाची, पापी आचरणाची, लांब केश नखे व स्तन असलेली किंवा विटलेल्या रंगाची फुले व वस्त्रे नेसलेली स्त्री पाहणे मृत्युरूपी रात्र पहाण्यासारखेच होय. **शुभस्वप्ने**—जो स्वप्नात देव, ब्राह्मण, गाय, बैल, जिवंत मित्र, राजा, साधु, यशस्वी लोक पाहातो, तसेच ज्वालायुक्त अग्नि, स्वच्छ जलाशय, कन्या, गौरवर्णाचे– पांढरी वस्त्रे ल्यालेले तेजस्वी बालक, भोवताली रक्ताने माखलेले जळत असलेले राक्षस पहातो; ज्याला छत्री, आरसा, विष, मांस, मिळते; पांढरी फुले, वस्त्रे, गलिच्छ पदार्थ अंगाला माखणे, फळे मिळणे; जो डोंगर, राजवाडा, फळाचे झाड, सिंह, मनुष्य, हत्ती, बैल, घोडा, वाहन यावर आरूढ होतो; जो नद, तळे, समुद्र यात पोहतो, पूर्वेकडे उत्तरेकडे जाणे, जेथे जाणे अशक्य तेथे जाणे, मरण संकट यातून सुटका. देव- पितर याकडून अभिनंदन, रडणे, पडल्यावर, उठणे, द्वेष करणाऱ्यांचा पराभव होणे, स्वप्नात जो पहातो त्यास पुष्कळ आयुष्य व संपत्ति मिळते.

**-दर्शन**–न., **स्वप्ने यद्यद् दृष्टं तत्** ( चवि. ४.८ )
स्वप्नात जे जे पाहतो ते.

**-नाश**–पु., लक्षण० **स्वप्नो निद्रा, तन्नाशः निद्रानाशः** ( चचि. ५.४१ )
झोप न येणे, निद्रानाश.

**-नित्यता**–स्त्री., लक्षण० **निद्रालुत्वम्** ( चनि. ७.७(३)
झोपाळूपणा.

**-प्रसङ्ग**–पु., **निद्राया अधिकं सेवनम्** ( चसू. २१.३४ )
झोप अधिक घेणे.

**-विपर्यय**–पु., **रात्रौ जागरणं दिवसे च स्वप्नः** ( सुसू. ४६.५०० ) **जागरणम्, निद्रानाशः** ( सुउ. १.२६-२७ )
रात्री जागरण व दिवसा झोप. जागरण, निद्रानाश, झोप नसणे.

**स्वप्नानुवृत्तिः**–स्त्री., **निद्रानुवृत्तिः** ( चसि. १.४४ )
पुन्हा पुन्हा झोप घेणे.

**स्वप्नोपघात**–पु., **स्वप्ने भयङ्करैरभिभवः** ( इन्दु. असंउ. ४० )
स्वप्नात भयंकर दृश्य दिसल्याने आपला पराभव झालेला दिसणे.

**स्वफेनलेहिन्**–वि., **स्वफेनं विलेढुं शीलमस्येति** ( सुउ. ६०.१६ )
स्वतःच्या तोंडात येणारा फेस ( कफ ) चाटणारा.

**स्वभद्रा**–स्त्री., वनस्पति० **काश्मरी** (रा. ९.१४७; पृ. २९)
शिवण.

**स्वभाव**–पु., **प्रकृतिभावः** ( चशा. ७.१७ ) द्र० **'प्रकृति'** ( सुस. ३२.१ ) **सहजो गुणः** ( चसू. २७.४; सुसू. ४६.४४३ ) **स्वस्य धर्मः, यथा कण्टकस्य तीक्ष्णता, इक्षोर्माधुर्यं च** ( सुशा. १.११ )
मूळचे भाव. सहज गुण. मूळचा- स्वतःचा गुणधर्म. जसे काट्याची तीक्ष्णता. उसाचे मधुरत्व.
**निसर्गः** ( सुशा. ४.३३ ) निसर्ग.

**-तस्**–अव्य. **प्रकृतितः** ( सुसू. २०.३ ) **हेत्वन्तरनिरपेक्षतया** ( सुशा. ६.१५ )
स्वाभाविक, निसर्गतः, निराळ्या हेतूच्या निरपेक्ष, आपोआप.

**-नष्ट**–न., **निसर्गनष्टम्** ( कासू. १९ )
स्वाभाविक नाश झालेले, आपोआप नाश पावलेले.

**–परिगृहीत**–वि., **स्वभावसंबद्धः** ( चसू. ६.५ )
निसर्गाशी संबद्ध. आपोआपो संयुक्त झालेले.

**–बलप्रवृत्त**–पु., **रोग० प्रकृतिशक्तिजातो व्याधिः, यथा क्षुत्पिपासादिः** ( सुसू. २४.७ )
स्वाभाविक शक्तीने झालेला रोग. जसे भूक, तहान इत्यादी.

**–विप्रतिपत्ति**–स्त्री., **अध्याय०** ( सुसू. ३२.१ )
अध्यायाचे नाव. स्वाभाविकाच्या विरुद्ध होणाऱ्या गोष्टींची माहिती यात आहे.

**–व्याधि**–पु., **स्वभावप्रवृत्तो व्याधिः द्र० ' स्वभावबलप्रवृत्तरोग '** ( सुचि. २९.१ )
स्वाभाविक तऱ्हेने होणारा व्याधि.

**–व्याधिप्रतिषेधनीय**–वि., **अध्याय संज्ञा०** ( सुचि. २९.१ )
अध्यायाचे नाव. स्वाभाविक विकारांचा प्रतिबंध, उपाय यात सांगितले आहेत.

**–शीत**–वि., **सहजशीतलम्** ( चचि. २२.५७ )
स्वाभाविक थंड.

**–संसिद्ध**–वि., **स्वाभाविकम्** ( चसू. ३०.२७ )
स्वाभाविक, स्वभावतः झालेले.

**–सिद्ध**–वि., **प्रकृतिसिद्धः, यथा ताल्वोष्ठजिह्वानां रक्तत्वम्** ( सुसू. ३२.३ )
स्वाभाविक; नैसर्गिक ( जन्मतः ) जसे टाळू, ओठ, जीभ यांची लाली असणे.

**स्वभावोपरम**–पु., **स्वभावेनोपरमः, कारणाद्विनाऽपि नाशो भवति** ( चसू. १६.२७ )
स्वाभाविक– कारणावाचून होणारा नाश. स्वभावतः होणारा नाश. आपोआप होणारा नाश.

**स्वभुजोपधान**–न., **स्वभुजयोरुपधानम्, गण्डुः, उपधानं कन्दुकः** ( चक्र. चसि. ३.१८ ) **अत्र भुजयोरुपधानीकरणमेव इष्यते**
स्वतःच्या भुजांची– हातांची केलेली उशी; गंडु, कंदुक म्हणजे उशीच.

**स्वभ्यक्त**–वि., **सुष्ठु अभ्यक्तम्** ( ड. सुचि. ३.२६ )
चांगले माखलेले, चांगला अभ्यंग केलेले. योग्य तितका स्नेह लावलेले–चोपडलेले.

**स्वमणि**–पु., **रत्न० सूर्यकान्तः** ( ड. सुउ. ६०.१९ )
सूर्यकांत मणि. स्वतःचा मणी हा मूळ अर्थ 'स्वमणिं भास्करार्चिश्च (विशति) या वाक्यात सूर्यकांत मणि हा अर्थ झाला आहे.

**स्वयम्**–अव्य., **आत्मार्थे उपयुज्यते** (सुसू. ३४.१९-२०)
स्वतः, आपण, आपले आपण- आपल्याकरिता हे अव्यय उपयोगात आणतात.

**–कृतिन्**–वि., **स्वप्रज्ञया चिकित्सायां प्रवृत्तः ( वैद्यः )** ( सुसू. ३४.१९-२० )
स्वतः करणारा. स्वतःच्या बुद्धीने उपचारात प्रवृत्त झालेला ( वैद्य. )

**–गुप्ता**–स्त्री., **वनस्पति० कपिकच्छुः** ( सुउ. ४९.२९; ध. १.१५१ )
खाजकुहिली, कुहिली.

**–गुप्तादिसर्पिस्**–न., **सिद्धघृत० सर्वमूत्रदोषघ्नं, रक्तदोषघ्नं च** ( सुउ. ५८.५३-५७ )
खाज कुहिली इ० औषधींनी सिद्ध केलेले तूप– सर्व मूत्रदोषनाशक व रक्तदोषनाशक.

**–प्रभ**–पु., **सोम०** ( सुचि. २९.६ )
सोममहौषधिप्रकार.

**–भुवा**–स्त्री., **वनस्पति० धूम्रपत्रा** (रापरि. ५.८)
एक वनस्पती.

**–भू**–वि., **अनाद्यजातः** ( सुनि. १.५ )
स्वतः झालेला, आदि–आरंभ नसलेला व न जन्मलेला
पु., **ब्रह्मा** ( सुसू. १.४१ ) ब्रह्मदेव.
**वनस्पति० माषपर्णी** ( रा. ३.१७२ ) रानउडीद.
**लिङ्गिनी** ( रापरि. ३.१६ ) शिवलिंगी.

**स्वयमग्निरस**–पु., **योग० त्रिकटुत्रिफलैलाजातीफललवङ्ग-समभागानां चूर्णं क्षौद्रे आलोडयेत्। मात्रा निष्कद्वयम् क्षयकासनाशकः** ( र. १३.४६-४७ )
एक औषधि योग. त्रिकटु, त्रिफला, वेलदोडा, जायफळ, लवंग समभाग मध घालून घ्यावे. क्षयनाशक. आठ मासे प्रमाणात घेणे.

**स्वर**–पु., **ध्वनिः** ( चइ. १४; अहसू. ५.६३ ) ध्वनि. **सप्तसंख्यामानम्, सप्तस्वराणां प्रसिद्धत्वात् स्वरपरमपि सप्तसंख्याभिधायकत्वेन प्रयुज्यते** ( र. ११ १०३ )
स्वर सात आहेत. स्वर म्हणजे सात (संख्या) स्वर या शब्दाने सात संख्या समजली जाते.

**–क्षय**–पु., **रोग० स्वरस्य क्षयः** (चचि. १.७१) **शोणितविकारः** ( चसू. २४.१५ )
स्वराचा क्षय, रक्ताचा विकार.
**लक्षण० मन्दभाषित्वम्** ( असंनि ३.७ )
आवाज बसणे. हळु बोलणे. मंद वेगाने बोलणे, लहान अवाजात बोलणे,

**-ग्रह**-पु., रोग० स्वरस्य ग्रहः, स्वरावरोधः
( चचि. १६.२४ )
स्वराचा अवरोध, बोलण्याला अडखळणे.

**-घ्न**-पु., गलरोग० तल्लक्षणम्-अतिप्रताम्यमानता, निरंतरं निःश्वसनम्, भिन्नस्वरता, शुष्कविमुक्त-कण्ठत्वम्, अनिलमार्गेषु कफरुद्धेषु सत्सु वायुगतस्रोतसोः प्रतान्तत्वम् ( सुनि. १६.६१ )
घशाच्या रोगाचा प्रकार, स्वर नाशक. आवाज फुटणे, सारखा श्वास बाहेर टाकणे, अति अंधेरी येणे, सुकलेला व खुला घसा असणे, श्वासाचा मार्ग कफाने रुद्ध असतो. हा वातामुळे होतो.

**-दौर्बल्य**-न., लक्षण० स्वरमान्द्यम् (चसू. ४४.१४)
स्वर दुबळा असणे, स्वराची अशक्तता.

**-नाश**-पु., लक्षण० स्वरहानिः ( असंसू. ३६.७ )
स्वरनाश, स्वरहानि. आवाज बसणे, बोल न निघणे.

**-बोधन**-वि., स्वरं बोधयति इति स्वर्यम्
( चचि. ८.९७ )
स्वर नीट करणारे, स्वराला हितकर.

**-भङ्ग**-पु., रोग० वैस्वर्यम्, स्वरभेदः ( र. २५.४४ )
आवाज फुटणे, घोघरा आवाज होणे.

**-भेद्**-पु., रोग० ( सुउ. ५३.१ ) तत्संप्राप्तिः-अत्युच्चभाषणविषाऽतिगीतशीतादिभिः प्रकुपिता पवनादयः, स्वरवहेषु स्रोतस्सु प्रतिष्ठां गताः स्वरं हन्ति। स्वरभेदप्रकाराः-वातजः, पित्तजः, कफजः, सन्निपातजो मेदोजः, क्षयज इति षड्विधः ( सुउ. ५३.३ ) तल्लक्षणम्, तत्र वातजः-कृष्ण-नयनाननमूत्रवर्चाः सगद्गदस्वरः; रूक्षः, क्षामश्चल-स्वरश्च ( च. ) पित्तजः-पीतवदनाक्षपुरीषमूत्रत्वं, गलदाहः, तालुदाहः वक्तुमसूया च ( च.) कफजः-कृच्छ्रान्मन्दं शनैर्भाषणम्-दिवा विशेषः, स्वरस्य खुरखुरायमाणत्वम् (च.) सान्निपातिकः-सर्वदोषजः-लक्षणयुक्तोऽस्पष्टवाणीकः मेदोजः-दिग्धगलौष्ठ-तालुरन्तर्गले चिरेणास्पष्टस्वरोत्पत्तिश्च; क्षयजः-ब्रुवतो मुखाध्दूमवद् उद्गमनम् ( सुउ. ५३.३-६ ) चरकतन्त्रे स्वरभेदस्यान्या एव षड्भेदा उक्ताः-त्रयो दोषजाः, रक्तजः, कासजः पीनसजश्च ( चचि. ८.५३-५६ ) साध्यासाध्यत्वम्, क्षीणवृद्ध-कृशचिरोत्थितसहजमेदोजसन्निपातजा असाध्याः ( सुउ. ५३.७ ) चिकित्सा-अयं स्वेद्यः ( चसू. १४.२० ) यथाविधि वमनविरेचनबस्ति-भिश्च नस्यावपीडमुखधावनधूमलेहैर्विविधैः कवलग्रहैश्चापकृष्टदोषान् संपादयेत्
( सुउ. ५३.८; असंनि. ५ )
आवाज फुटणे. अति उंच आवाजात भाषण, गाणे, अध्ययन करणे, अति गाणे, विष, अति थंड इत्यादीं-मुळे वातादी दोष स्वरवाही स्रोतसात जाऊन स्वर हानी करतात. प्रकार ६-वात, पित्त, कफ, सन्नि-पात, मेद व क्षय यांपासून होणारा. लक्षणे-**वातज**-डोळे, तोंड, मूत्र, मळ, काळे; गद्गद बोलणे; रूक्ष, अशक्त व कापरा स्वर. **पित्तज**-तोंड, डोके, मळ, मूत्र पिवळे; गळा, टाळू यांची आग; बोलण्याचा कंटाळा. **कफज**-स्वर खरखरीत, कष्टाने लहान आवाजात हळु हळु बोलणे. (दिवसा) विशेष.) **सन्निपातज**-वाणी स्पष्ट, सर्व दोषांची लक्षणे. **मेदोज**-गळा, ओठ, टाळू व आतला गळा लपेटलेला; बोलताना उशिरा व अस्पष्ट शब्दोच्चार होतो. **क्षयज**-बोलताना तोंडातून धूर ओकल्या-सारखे वाटते. चरकात दुसरे सहा प्रकार आहेत. दोषज तीन, रक्तज खोकल्यापासून पडशापासून. **साध्यासाध्यत्व**-क्षीण, म्हातारा, कृश यांचा दीर्घकाळ राहिलेला जन्माबरोबरचा मेदोज व सन्नि-पातज असाध्य. **उपचार**-याला शेकणे जरूर. वमन, विरेचन, बस्ती, अवपीडक नस्य, तोंड धुणे, धूम्रपान, चाटणे, गुळण्या यांनी दोष हरण करावे. लक्षण० राजयक्ष्मप्रभृतिरोगेषु लक्षणम्
( सुउ. ४१.११ )
क्षय इत्यादी रोगात लक्षण.

**-भेदप्रतिषेध**-पु., अध्यायसंज्ञाविशेषः
( सुउ. ५३.१ )
अध्यायाचे नाव. स्वरभेदाचे उपचार यात सांगितले आहेत.

**-भ्रंश**-पु., लक्षण० स्वरभेदः ( असंनि. ५,१७ )
स्वरभेद, आवाज फुटणे.

**-वहस्रोतस्**-न., स्रोतो० स्वरमार्गः शब्दवाहिनी धमनी ( डसुउ. ५३.३ )
स्वरमार्ग. शब्दवाहिनी धमनी.

**-विशुद्धि**-स्त्री., स्वरशुद्धिः ( असंसू. २७.१९ )
स्वराची शुद्धी.

**-वैकृत**-न., लक्षण० स्वरहानिः ( सुशा. ६.२७ )
स्वराची विकृती, स्वराची हानी.

**-संख्या**-स्त्री., **सप्त-संख्या** ( र. १८.१२२-२३ ) स्वरांची संख्या, सात.

**-सदन**-न., **रोग० स्वरभेदः** ( अहृसू. १६.१७ ) स्वरसाद, स्वर खालावणे, आवाज फुटणे, आवाज बसणे.

**-साद**-पु., **रोग० स्वरभेदः द्र० 'स्वरभेद'** ( असंनि. ५.२३ ) स्वर खालावणे, स्वर फुटणे, आवाज बसणे.

**-स्कन्द**-पु., **वनस्पति० प्रियालः** (ध. ५.७२ पृ.१८३) चारोळी.

**-हटी**-स्त्री., **वनस्पति० बला** ( रा. ४.४३२; पृ.६६ ) चिकणा.

**-हन्**-पु., **कण्ठगतरोग० यस्मिन् दुष्टेन श्लेष्मणा अनिलस्य गती रुद्धा भवति, किंच पुरुषः शुष्क-कण्ठो हतस्वरश्च स्यात्। येन च तमः प्रविशन् प्रकर्षेण सक्तं श्वासं मुञ्चति, स व्याधिर्वातात् स्वरहनित्युच्यते** ( असंउ. २५ ) घशातील विकार, ज्यात दुष्ट कफाने वाताची गती रुद्ध होते व मनुष्याचा घसा सुकतो व स्वर ही बसतो. ज्याने अंधेरी येते व जोराने अडवलेला श्वास सोडतो. तो स्वरहन् विकार होय.

**-हानि**-स्त्री., **लक्षण० स्वरस्य हानिः** (चसि. ९.६) स्वराची हानि, आवाजाचा नाश.

**स्वरस**-पु., **ओषधेः अङ्गरसः, पञ्चविधकषायकल्पनेष्वेकः** ( चसू. १.७३; चसू. ४.७ ) **आर्द्रद्रव्यपेषणजरसः, तच्चार्द्रद्रव्यं यन्त्रेण पीड्यमानमिष्यते** ( सुचि. १०.१२ )
**स्वरसालाभे प्रतिनिधिरूपेण चूर्णानामाढकमाढक-मुदकस्याहोरात्रस्थितं मृदितपूतं स्वरसवत्प्रयोज्यम्** ( चचि. १(२).१२ )
आंगरस. ओली वनस्पती कुटून किंवा वाटून, पिळून काढलेला रस. पाच काढ्यांच्या पाच कल्पनापैकी एक. जेव्हा स्वरस निघत नसेल तेव्हा वनस्पतीचे चूर्ण रात्री पाण्यात भिजवून सकाळी ते कुसकरून गाळून घ्यावे व स्वरसाप्रमाणे उपयोग करावा.
**क्वाथः** ( ड. सुचि. १० १२ ) काढा.

**(स्वरसा)**-स्त्री., **वनस्पति० नाकुली** ( रा. ७.१५२; पृ. १५४ ) मुंगुसवेल.

**-परिपीत**-वि., **स्वरसः परिपीतो स्वरसभावितः ( आमलकः ) येन सः** ( चचि. १(३).३ ) आंगरसाच्या भावना दिलेला. आंगरस प्यालेला ( आवळा ).

**-विधि**-स्त्री., **स्वरसनिर्माणम्** ( चचि. १(२).१२ ) स्वरस काढणे. आंगरस निर्माण करणे. स्वरस काढण्याची रीति.

**स्वरातुर**-वि., **स्वरभेदेनार्तो जनः** ( सुउ. ५३.८ ) स्वर विकारी, आवाज फुटलेला रोगी.

**स्वराधिकार**-पु., **स्वरवर्णम्, स्वरस्य भेदद्वयम्; प्रकृतिस्वरो विकृतिस्वरश्च** ( चइ. १.१४ ) स्वराची माहिती असलेले प्रकरण, स्वराचे प्रकार दोन. स्वाभाविक व विकृतस्वर.

**स्वरामय**-पु., **रोग० स्वरभेदः** ( सुचि. १८.१५ ) स्वररोग, स्वर फुटणे, स्वर विकार.

**स्वरार्थिन्**-वि., **स्वरमिच्छन्, स्वरसौष्ठवाभिलाषुकः** ( असंसू. ६.७४ ) चांगला स्वर इच्छिणारा. आवाज चांगला व्हावा असे इच्छिणारा.

**स्वरावसाद**-पु., **लक्षण० स्वरभङ्गः ( ड. ) स्वरभेदः** ( सुक. ४.३७ ) स्वर खालावणे, आवाज बसणे.

**स्वरूढदन्त**-पु., **दन्तसंज्ञा० अष्टानां स्वरूढदन्तानां राजदन्ततश्चतुर्थः पञ्चमश्च** ( कासू. २४.४ ) दाताचे नाव. आठ स्वरूढ दात. राजदंतापासून चवथा व पाचवा.

**स्वरूप**-न., **आकृतिः** ( अहृसू. ६.१ ) स्वतःचे रूप, आकृती.

**स्वरूपोपमर्द**-पु., **स्वरूपनाशः** ( असंशा. ६.६९ ) स्वरूपनाश.

**स्वरोपघात**-पु., **रोग० स्वरभेदः** ( सुचि. ३३.१५ ) स्वराची हानी, स्वरभेद, आवाज फुटणे.
**लक्षण० स्वरस्योपघातः** ( चसि. २.८ ) स्वराचा भेद. आवाज फुटणे.

**स्वर्जिक**-पु., **खनिजद्रव्य० क्षार० स्वर्जिकाक्षारः** ( रा. ६.२६; पृ. ७२ ) सज्जीखार.

**( स्वर्जिका )**-स्त्री., **खनिजद्रव्य० क्षार० सर्जिकाक्षारः** ( सुउ. ३९.२५६; असंसू. १२.३७-३९ ) सज्जीखार.

**-लवण**-न., **खनिज० क्षारः सर्जिकाक्षारः** ( चवि. ७.१७ ) सज्जीखार.

**स्वर्जिक्षार**–पु., खनिज० क्षार० सर्जिकाक्षारः (सुश्रु. ५०.२१; रा. ६.२६; पृ. ७२)
सज्जीखार.

**स्वर्ण**–न., खनिज० सुवर्णम् (रा. १३.१, पृ. २०६)
सोने.
वनस्पति० धत्तूरः (र. १२.९७-९८) धोतरा.

**–कण**–पु., निर्यास० कणगुग्गुलुः (रा. १२.१८६; पृ. १२०)
गुग्गूळ.

**–क्षीररस**–पु., भैषज्य० असौ सुप्तिलक्षणकुष्ठविनाशनः (र. २०.१६०-६२)
पिवळ्या धोत्र्याच्या रसाचा कल्प. हा सुनबहिरीनाशक. स्पर्शनाश असलेल्या कुष्ठाचा नाशक.

**–क्षीरिणी**–स्त्री., वनस्पति० काञ्चनक्षीरी (चसू ४.९)
सुवर्णक्षीरी, पिवळा धोत्रा, पिसोळा.

**–क्षीरी**–स्त्री., वनस्पति० स्वर्णक्षीरी, काञ्चनक्षीरी भेदः द्र० 'काञ्चनक्षीरी' (चचि. २७.३६) (रा. ५.३६५, पृ. ५७.)
पिवळा धोत्रा. पहा 'कांचनक्षीरी.

**–गैरिक**–पु., न., खनिज० गैरिकभेदः सुवर्णगैरिकम् (असंउ. १४; ध. ३.१६७-७०, पृ. २८)
सोनकाव, सोनगेरू.

**–जीवन्तिका**–स्त्री.,वनस्पति० (रापरि. ३.१४ पृ. ३३०)
पिवळ्या फुलांची सोनेरी वेल.

**–जीवा**–स्त्री., वनस्पति० हेमा (रापरि. ३.१३ पृ. ३३०)
पिवळ्या फुलाची सोनेरी वेल.

**–दुग्धा**–स्त्री. वनस्पति० सर्वक्षीरी, काञ्चनक्षीरीभेदः काञ्चनक्षीरी (ध. १.२४२ पृ. ५७)
पिवळा धोत्रा.

**–द्रु**–पु., वनस्पति० आरग्वधः (रा. ९.३३४. पृ. ५२)
बहावा.

**–धत्तूर**–पु., वनस्पति० काञ्चनक्षीरी (र. १६.१५१-५३)
पिवळा धोत्रा.

**–धातु**–पु., खनिज० सुवर्णगैरिकम् (रा. १३.२३३; पृ. १२१)
सोनकाव, सोनगेरू.

**–पर्णी**–स्त्री., वनस्पति० हेमा (रापरि. ३.१३; पृ. ३३०)
पिवळ्या फुलांची सोनेरी वेल.

**–पारेवत**–न., वनस्पति० महापारेवतम्, पारेवतम् (रा. ११.९०; पृ. १८१)
खजूर.

**–पुष्प**–पु., वनस्पति० आरग्वधः (रा. ९.३३४; पृ. ५२)
बहावा.
चम्पकः (रा. १०.२३८; पृ. १९९)
चाफा, सोनचाफा.

**–(पुष्पा)**–स्त्री., वनस्पति० कलिकारी (रा. ४.१८; पृ.१३६)
कळलावी.
वृश्चिकाली (रापरि. ९.९; पृ. ३६४) विंचवी.

**–(पुष्पी)**–स्त्री., वनस्पति० सातला (रा. ४.३६०; पृ. ५६)
शिकेकाई.
केतकी (रापरि. १० ३; पृ. २०४) केवडी, केवडा.

**–पुष्पध्वजा**–स्त्री., वनस्पति० स्वर्णुली (रापरि. ४.३०; पृ. ३३७)
सोनेरी फुलाची वनस्पती.

**–पुष्पिका**–स्त्री., वनस्पति० कलिहारी (४.७६-७७)
कळलावी.
पीतपुष्पा (र. ४.७६-७७)
पिवळ्या फुलांची वनस्पती.
केतकी (र. ४.७६-७७) केवडी, केवडा.
काञ्चनक्षीरी (र. ४.७६-७७) पिवळा धोत्रा.

**–फला**–स्त्री., वनस्पति० सुवर्णकदली (रा. ११.११५; पृ. १४९)
सोनकेळ.

**–भृङ्गार**–पु. वनस्पति० पीतभृङ्गराजः (रा. ४.२१; पृ.१३६)
पिवळा माका, भांगरा.

**–मातृ**–स्त्री., वनस्पति० महाजम्बूः (रा. ११.१३०; पृ. १८६)
मोठे जांभूळ.

**–यूथिका**–स्त्री., वनस्पति० यूथिका (चसि. १०.३१); (ध. ५.१४८; पृ. २००) सोनजुई.

**-लता**-स्त्री., **वनस्पति० हेमा**
( रापरि. ३.१४; पृ. ३३० )
पिवळ्या फुलांची सोनेरी वेल.
**ज्योतिष्मती** ( रा. ३.३९५, पृ. ६१ )
मालकांगोणी.

**-वर्णी**-स्त्री., **वनस्पति० हरिद्रा** (रा. ६.७९; पृ. १८)
हळद.

**स्वर्णाह्वा**-स्त्री., **वनस्पति० सर्वक्षीरी, काञ्चनक्षीरीभेदः**
( रा. ५.३६५ पृ. ५७ )
पिवळा धोतरा, पिसोळा.

**स्वर्णुली**-स्त्री., **वनस्पति० तद्गुणाः- कटुका, कषाया, शीता, व्रणापहा च** ( रापरि. ४.३०; पृ. ३३७ )
गुण-तुरट, तिखट, थंड, व्रणनाशक.

**स्वर्य**-वि., **स्वराय हितम्** ( चसू. २७.३१४ )
आवाजाला हितकारक.

**स्वल्पतण्डुला**-वि., **अष्टांशतण्डुलकृता (यवागू)**
( ड. सुचि. ३९.७ )
आठवा हिस्सा तांदूळ घेऊन केलेली पेज ( यवागू )

**स्वल्पफला**-स्त्री., **वनस्पति० हपुषा** (रा.४.१२; पृ. ७०)
शेरणी.

**स्ववाक्यसिद्धि**-स्त्री., **स्ववाक्यस्थापनम्, तच्च निर्णयाख्यया तन्त्रयुक्त्या** ( ड. सुउ. ६५.५ )
स्वतःच्या वाक्याची-विधानाची सिद्धि करणे. ते निर्णय नावाच्या तंत्रयुक्तीने करणे.

**स्वसंज्ञा**-स्त्री., **तन्त्रयुक्तिविशेषः या तन्त्रकारैर्व्यवहारार्थं संज्ञा क्रियते सा** ( चसि. १२.४४ ) **अन्यशास्त्रसामान्या स्वसंज्ञा, यथा मिथुनेन मधुसर्पिषोर्ग्रहणम्** ( सुउ. ६५.३४ )
एक तंत्रयुक्ति. शास्त्रकारांनी शास्त्रव्यवहाराकरिता निश्चित अर्थाने ठरविलेला शब्द असतो तो. स्वतःची परिभाषा. अन्यशास्त्रात न आढळणाऱ्या संज्ञेपेक्षा भिन्न अर्थाने वापरलेला शब्द. जसे मिथुन म्हणजे मध व तूप यांची जोडीच घेणे.

**स्वस्तिक**-पु., **भक्ष्य० यवादिचूर्णैः कृतोऽधोभागे विस्तीर्ण ऊर्ध्वभागे तीक्ष्णो मध्ये वलित्रयमुद्राङ्कितः, 'मोदकः'** (ड. सुउ.६०.३२-३३) **स्वस्तिकाकारः, पिष्टविकारः** ( इन्दु. असंउ. ४ )
स्वस्तिकाच्या आकाराचा केलेला पिठाचा खाद्य पदार्थ. जव इत्यादींच्या पिठाचा खाली पसरट, वर टोक व मध्ये उभ्या तीन वळ्या असलेला पदार्थ मोदक. स्वस्तिकाच्या आकाराचा पिठाचा केलेला पदार्थ.
**वनस्पति० शितिवारः** ( ध. १.१५५; पृ. ३६ )
कुरडू.
पु., न., **व्रणबन्ध० स्वस्तिकबन्धः** ( सुसू. १८.१७-१८) **अंससन्धौ पट्टबन्धनार्थम् उपयुक्तोऽयम्** ( असंउ. ३२ )
जखमेवर बांधण्याचा पट्टा. खांद्याच्या सांध्यावर उपयुक्त.
**मुक्तादाम** ( सुसू. २९.२७-२९ ) मोत्याची माळ.
**मङ्गलविशेषः स्वस्तिकाकारं दूर्वाशकलमण्डितं धवलं दर्पणसक्तं मृण्मयं गोमयकृतं मङ्गल्यमवतारणकार्यं कुर्वते माङ्गलिककृत्स्त्रियः** ( ड सुसू. २९.२७-२९ )
मंगलरचना-विशेष. आरशावर शुभ चिन्ह म्हणून स्वस्तिकाच्या आकाराची शेण किंवा मातीची आकृति करून दूर्वा वगैरेनी शोभिवंत केलेली असते ती.

**-बन्ध**-पु., **व्रणबन्ध० स्वस्तिकाकारव्रणबन्ध अयं सन्धिकूर्चकभ्रूस्तनान्तरतलकर्णेषु विधेयः** ( सुचि. ३.३१ ) **अंससन्धौ पट्टबन्धनार्थमुपयुक्तः** ( असंउ. ३२ )
स्वस्तिकाच्या आकाराचा व्रणावर बांधावयाचा पट्टा. दोन्ही हा सांधा कूर्चक, भुवई, स्तनामध्ये, तळहात व कानाच्या ठिकाणी व खांद्याच्या संधीवर बांधण्यास उपयुक्त.

**-यन्त्र**-न., **यन्त्र० अष्टादशाङ्गुल प्रमाणम्, व्यालादिमुखसदृशं कीलेनाबद्धं, मूलेऽङ्कुशवदावृत्तवाराङ्गमाकारानुगताभिधानम्, तत्तु चतुर्विंशतिविधम्**
( सुसू. ७.१० अहसू. २५-६ )
अठरा अंगुळे लांब, वाघ इत्यादिकांच्या तोंडासारखे खिळयाने पक्के केलेले, मुळात अंकुशासारखे, वाटोळी मूठ असलेले यंत्र. चोवीस प्रकारचे.

**स्वस्तिवाचन**-न., **मङ्गलविधिविशेषः** ( चसू. १५.९ ) **आशीर्वादोच्चारणम्** (सुसू. ५.७) **वेदमन्त्रोच्चारपूर्वकं पुण्याहवाचनम्** ( सुशा. १०.८ )
एक मंगलविधि. आशीर्वादोच्चारण. वेदमंत्रोच्चारपूर्वक पुण्याहवाचन.

**स्वस्तिशब्द**-पु., **माङ्गल्यबोधकशब्दः** (असंशा. १२.८)
मांगल्यबोधक शब्द.

**स्वस्त्ययन**-न., **अथर्ववेदचिकित्सा० स्वस्तिवाचनम्** ( चसू. ३०.२१ ) **शान्तिमन्त्र०** ( चनि. ७.१६ ) **कल्याणम्** ( काइ. ३० )
अथर्ववेदात सांगितलेला उपचार, स्वस्तिवाचन, शान्तिदायक मंत्र, कल्याण.

**स्वस्थ**-वि., **अरोगी** ( चसू., १.२४ ) **स्वस्मिन् नाम आत्मनि आनंदरूपेण तिष्ठतीति। यः समदोष समाग्निश्च समधातुमलक्रियः प्रसन्नात्मेन्द्रियमनाः स एव स्वस्थः** ( सुसू. १५.४१ ) **समवातपित्तकफः पुरुषः** ( ड. सुचि. ३८.२९ )
निरोगी. स्वतःच्या ठिकाणी म्हणजे आत्म्याच्या ठिकाणी आनंदी स्वरूपात राहतो तो स्वस्थ. ज्याचे दोष सम ( शरीर चांगल्या रीतीने-सुखाने चालण्यास जितके प्रमाण अत्यावश्यक तितके ) असतात, अग्नि सम, धातु मल व त्यांच्या क्रिया सम असतात, ज्याचा आत्मा मन व इंद्रिये प्रसन्न असतात तोच स्वस्थ होय. समवातपित्तकफ असलेला.

**-ता**-स्त्री., **स्वास्थ्यम्** ( असंसू. २७.१९१ )
स्वास्थ्य, आरोग्य, निरोगीपणा.

**-वृत्त**-न., **अरोगस्याहाराचारादिवृत्तम्, स्वस्थस्याचारः** ( सुउ. १.७; अहसू. २०.१४ )
निरोगी मनुष्याचा आहार विहार इत्यादी वागणूक; स्वस्थाचा आचार.

**-वृत्ताध्याय**-पु., **अध्यायसंज्ञा०** ( सुउ. ६४.१ )
अध्यायाचे नाव. यात स्वस्थाचा आचार दिलेला आहे.

**-वृत्तानुवृत्ति**-स्त्री., **स्वस्थवृत्तस्यानुवर्तनम्, स्वस्थवृत्तनरस्य स्वस्थवृत्तानुच्छेदपूर्वका यद्वा तज्ज्ञापिका शरीर-क्रिया** ( कासू., २४ )
स्वस्थाच्या आचाराचे आचरण. स्वस्थाचाराचे पालन करणाऱ्या मनुष्याच्या आचाराची सातत्याने आचरणात आणावयाची किंवा त्याची शोधक शरीर-क्रिया.

**-वृत्ति**-स्त्री., **नीरोगत्वेनानुवर्तनम्** ( चसू. १.६७ ) **स्वस्थवृत्तम्** ( चसू. ५.१४ )
निरोगीपणाने राहणे, स्वस्थवृत्त. आरोग्याचा आचार.

**-हित**-न., **दोषादीनां साम्यानुवृत्तिहेतुद्रव्यम्** ( अहसू. १.१६ )
दोषादिकांचे साम्य सातत्याने राखणारी द्रव्ये. आहार विहार.

**स्वस्थानस्थ**-वि., **स्वे स्थाने स्थितः ( दोषः )** ( चचि. २८.१९८ )
स्वतःच्या स्थानात असलेला ( दोष ).

**स्वाङ्गशीत**-वि., **अग्निना पक्वं द्रव्यमग्निनिर्वापणानन्तरं तत्रैव स्वतःशीतं जातम्** ( र. ५.३९-४१ )
अग्नीने शिजवलेले व अग्नि काढल्यानंतर तेथेच आपोआप थंड होणारे द्रव्य.

**स्वाङ्गशीतल**-न., **स्वाङ्गशीतम्** ( र. ८.६० )
आपोआप थंड होणारे.

**स्वाङ्गुलोन्मित**-वि., **स्वस्याङ्गुलिभिः परिगणितम्** ( असंशा. ७.३३ )
स्वतःच्या अंगुलीनी मोजलेले.

**स्वाचार**-वि., **शोभनाचारः** ( ड. सुउ. ६०.१० )
स्वतःचा आचार. चांगले वर्तन, शुभ आचार.

**स्वातन्त्र्य**-न., **स्वकर्मविषये स्वाधिकारत्वम्** ( सुनि. १.६ )
स्वतःच्या वागणुकीवर स्वतःचे नियंत्रण, स्वतःचा अधिकार असणे, स्वतःच्या मनाप्रमाणे वागणे.

**स्वादु**-वि., **मधुरः** ( चसू. २७.१३ )
पु,. **रस० षड्रसेष्वेको मधुरः द्र० 'रस'** ( चसू. १.६५ )
गोड. सहा रसांपैकी एक रस. पहा 'रस'.
**वनस्पति० अगरुः** ( रा. १२.३९ ) अगरु.
**वनस्पति० जीवकः** ( ध. १.१२३ ) अष्टवर्गांपैकी.
न., **आहारद्रव्य० दुग्धम्** (ध. ६.१६१; पृ. २३९) दूध.
**वनस्पति० गृञ्जनम्** ( ध. ४.३७; पृ. १४१ ) गाजर.

**-कण्ट**-पु., **वनस्पति० क्षुद्रगोक्षुरः, गोक्षुरः** ( रा. ३.१३२; पृ. २६ )
लहान गोखरू, गोखरू.

**-कण्टक**-पु., **वनस्पति० गोक्षुरः** ( चवि, ८.१३५; ध. १.१०२; पृ. २६ सुचि. २२.३२; ) गोखरू.
**विकङ्कतः** ( चक्र. चक. १.२२; सुसू. ४२.११; ध. ५.४३; पृ. १७७ )
बेहेकळ.
**विकण्टकः** (रापरि. ११.१९; पृ. ३७४) धमासा.
**कण्टकारिवृक्षः** ( सुचि. २२.३२) एक काटेरी वृक्ष.

**-कदली**-स्त्री., **वनस्पति० काष्ठकदली** ( ध. ४.७९; पृ. १४९ ) रानकेळ.

**-कन्द**-पु., वनस्पति० मुखालुः
( रापरि. ७.२२, पृ. ३४९ )
गोडकंद.
**(-कन्दा)**-स्त्री., वनस्पति० विदारी
( ध. १.१४७.पृ. ३४ )
भुईकोहळा.
**-कफ**-पु., वनस्पति० धन्वनः
( रापरि. ९.२०पृ. ३६५ )
धामणी.
**-जल**-न., मधुरजलम् ( असंसू. ६.९ ) गोड पाणी.
**-ता**-स्त्री., माधुर्यम् ( असंसू. ३९.१४ )
गोडी, मधुरत्व, गोडपणा.
**-तुण्डिका**-स्त्री., वनस्पति० मधुरबिम्बी
( रा. ७.३०४; पृ. ४८ )
गोड तोंडले.
**-त्रिफला**-स्त्री., फलत्रय० द्राक्षा-खर्जूरकाश्मरीफलानां समूहः, द्राक्षादाडिमखर्जूरं वा
( ध. ७.३; पृ. २९९ )
गोड फळांची त्रयी. द्राक्ष, खजूर व शिवणफळ किंवा द्राक्ष, डाळिंब, खजूर ही त्रयी.
**-पटोली**-स्त्री., वनस्पति० पटोल० स्वादुपटोली, द्र० 'पटोल' ( रा. ७.७६; पृ. १७ )
गोड पडवळ.
**-पत्रफला**-स्त्री., वनस्पति० पटोल० स्वादुपटोली, द्र० 'पटोल' ( ध. १.५२; पृ. १७ )
गोड पडवळ,
**-पाका**-स्त्री., वनस्पति० काकमाची
( रा. ४.३६; पृ. १३८ )
कावळी.
द्राक्षा० उत्तरापथिका, द्राक्षा
( ध. ५.५८; पृ. १७९ )
द्राक्ष.
**-पिण्डा**-स्त्री., वनस्पति० पिण्डखर्जूरिका
( ध, ५.५५; पृ. १७९ )
पेंडखजूर.
**-पूर्वपर्याया**-स्त्री., वनस्पति० पटोल० स्वादुपटोलम् द्र० 'पटोल' ( रा. ७.७७ पृ.१७ )
गोड पडवळ.
**-फला**-स्त्री., वनस्पति० कदली
( ध. ४.७५ पृ. १४८ ) केळ.
कोशातकी ( रा. ७.२८८; पृ. ४६ )
दोडके, गिलके, घोसाळे.
कर्कोटकी ध. १.८७, पृ. ४४. ) कटोली.
**-भोजन**-न., स्वाद्वन्नसेवनम् ( सुसू. ४६. ४८२ )
गोड अन्नसेवन, सुग्रासभोजन.
**-मज्जा**-स्त्री., वनस्पति० अक्षोटः
( ध. ५.६०; पृ. १८० )
आक्रोड.
**-मस्तका**-स्त्री., वनस्पति० खर्जूरी,
(ध. ५.५३; पृ. १७८ )
शिंदी.
**-मांसी**-स्त्री., वनस्पति० काकोली
( ध. १.१३२. पृ. ३१ )
कावळी.
**-मूल**-न., वनस्पति० गर्जरम्
( ध. ४.६९ पृ. १४७; )
गाजर.
**-रस**-पु., मधुरो रसः द्र० 'रस'
( अहृसू. १२.५४ )
गोड रस.
-( **रसा** )-स्त्री., वनस्पति० मूर्वा (ध. १.१३; पृ. ९)
मोरवेल.
शतावरी (रा. ४.४३८; पृ. ६७) शतावरी.
**-लता**-स्त्री., वनस्पति० विदारी (रा. ७.१९४ पृ. ३५)
भुईकोहळा.
**-विपाक**-पु., विपाकेन मधुरः मधुरविपाकः द्र० विपाक ( असंसू. १.३८ )
पचल्यानंतर गोड. गोड पाक.
**-शाक**-न., यच्छाकं मधुरं तत्, गुणाः— विड्भेदि, गुरु, रूक्षं, विष्टम्भि, दुर्जरं, सकषायं च
( सुसू. ४६.२९६ )
गोड भाजी. ज्या गोड भाज्या असतात त्या; थोड्या तुरट, मळ फोडणाऱ्या, जड, रुक्ष, अवष्टंभक, पचावयाला जड असतात.
**-स्कन्द**-पु., वनस्पतिवर्ग० मधुरद्रव्यगणः
( असंचि. ७ )
गोड द्रव्यांचा गण.
**स्वादुका**-स्त्री., वनस्पति० नागदन्ती
( रापरि. ५.२७; पृ. ३४२ )
पांढऱ्या गोड फुलांची वनस्पती.

**स्वाद्वम्ल**–पु., वनस्पति० दाडिमः (ध. २.६१. पृ. ८१)
डाळिंब.

**स्वाधार**–वि., शोभनाभिधेयम् ( चक्र. ) अनुभवसिद्धम्, सुप्रतिष्ठितम् ( शास्त्रम् ) ( चवि. ८.३ )
चांगल्या आधारावरील-सिद्धांतावरील उत्तम सांगण्यासारखे, अनुभवाने सिद्ध, विज्ञान्यांना मान्य असे शास्त्र.

**स्वाप**–पु., लक्षण० सुप्तिः, स्पर्शाज्ञानम् ( ड. ) विचेतनत्वम् ( इन्दु. सुनि. १.३१ )
सुप्ति, स्पर्शनाश, स्पर्शाचे ज्ञान न होणे, सुनबहिरी.

**–शील**–वि., निद्रालुः ( सुशा. २.२५ ) झोपाळू.

**स्वाभाविक**–वि., स्वभावसंभूतः ( सुसू. १.२५-(४) ) कालपरिणामेन जातो जरामृत्युनिमित्तजो व्याधिः ( चशा. १.११५ )
निसर्गतः असलेले. कालाच्या परिणामाने झालेला वार्धक्य, मरणरूपी विकार. वार्धक्य व मरण ज्या कारणानी होतात त्यानी झालेला रोग.

**स्वायम्भु**–स्त्री., वनस्पति० ब्राह्मी ( रा. ५.१४८; पृ. १५४ )
ब्राह्मी.

**स्वार्थ**–पु., स्वविषयश्चिन्त्यादिः ( चसू. ८.५ )
स्वतःचा ( मनाचा ) विषय. चिंत्य, विचार्य इत्यादी.

**स्वास्थ्य**–न., स्वस्थस्य भावः स्वास्थ्यम्, उद्वेजकधातुवैषम्यविरहितधातुसाम्यम् ( चसू. ५.१२ ) स्वस्थता ( अहृसू. ८.४४ ) दोषधात्वग्निमलक्रियाणां समता, आत्मेन्द्रियमनसां प्रसन्नता च यस्मिन् सः स्वस्थः तस्य भावः स्वास्थ्यम् ( सुसू. १५.४१ )
स्वस्थाचे भाववाचक स्वास्थ्य. दुःखद धातुवैषम्य विरहित धातुसाम्य. स्वस्थता, आरोग्य.
दोष, धातु, अग्नि आणि मल मूत्रादी व त्यांच्या क्रियांची समावस्था आणि आत्मा, इंद्रिये व मनाचे प्रसन्नत्व ज्याचे आहे तो स्वस्थ. त्या स्वस्थतेचे अस्तित्व म्हणजे स्वास्थ्य.

**–कारण**–न., स्वास्थ्यहेतुः ( अहृसू. १२.७८ )
आरोग्याचा हेतु.

**–रक्षण**–न., स्वास्थ्यस्य रक्षणम् ( चसू. ३०.२६ )
आरोग्याचे रक्षण.

**स्वास्य**–पु., वनस्पति० वनबर्बरिका ( ध. ४.५८. रा. १०.८८. पृ.१४५ )
रान अजवल्याच्या जातीची भाजी.

**स्वाहा**–अव्य., हविर्दानसमये उच्चार्यमाणः शब्द० ( अहृसू. १८.१७ )
अग्नीला आहुती देण्याच्या वेळी उच्चारावयाचा शब्द.
स्त्री., अग्निपत्नी ( अहृसू. १८.१७ ) अग्नीची पत्नी.

**स्विन्न**–वि., स्वेदितः कृतस्वेदनः ( अहृसू. १७.१५ )
शेकलेला, घाम काढलेला.

**–देह**–वि., स्वेदितवपुः ( सुउ. ४०.१० )
घामावलेले शरीर, घाम काढलेले शरीर.

**स्विन्नोत्सन्न**–न., स्विन्नत्वेनोत्सन्नम् ( कुष्ठम् ) ( चचि. ७.५१ )
शेकल्याने वर उचलून आलेले ( कुष्ठ ).

**स्वेद**–पु., शारीर० मल० मेदसो मलः, घर्मः, रोमकूपेभ्यस्त्वग्रन्ध्रेभ्यो निष्पतदुदकस्वरूपं मलद्रव्यम् (चचि. १५.१८) तत्कार्यम्– शरीरार्द्रता, त्वक्सौकुमार्यञ्च ( सुसू. १५.५(२) ) स्वेदक्षयलक्षणम्– स्तब्धरोमकूपता, त्वक्शोषः, स्पर्शवैगुण्यम्, स्वेदनाशः ( सुसू. १५.११ ) स्वेदक्षीणोऽभ्यङ्गं, मर्दनं, मद्यं निवातशयनासनं, गुरुप्रावरणमभिकाङ्क्षति ( ड. सुसू. १५.२९-३१ ) वृद्धिलक्षणम्– कण्डूः दौर्गन्ध्यम् ( असंसू. १९.८ )
घाम मळ–मेदाचा. केसांच्या मुळापासून त्वचेच्या छिद्रांमधून बाहेर येणारे पाण्यासारखे मल द्रव्य. **कार्य**–शरिराला ओलावा ठेवणे, त्वचा सुकुमार–कोमल ठेवणे. **क्षयलक्षण**–केसांची मुळे ताठर, त्वचा सुकणे, स्पर्शात बिघाड, घामनाश. **आकांक्षा**–घामाने क्षीण मनुष्य अभ्यंग, मर्दन, मद्य, निवाऱ्यात निजणे, जड व जाड पांघरूण यांची इच्छा करतो. **वाढीची लक्षणे**–खाज, दुर्गंधी, शरीर ओले रहाणे.
**ऊष्मा** ( सुसू. १.२२ ) उष्मा, गरमी.
**उपक्रम० शरीरेण सहाग्नेः संयोगः, तापनम्, स्वेदनम्** ( चसू. १४.३ ) द्र० ' **स्वेदविधि** ' ( चसू. १.९६ )
एक उपचार. शरिराशी अग्नीचे सान्निध्य, शरीर तापविणे, शेकणे, घाम आणण्याचा विधि.

**–क्षय**–पु., लक्षण० स्वेदमलस्य हानिः द्र० ' स्वेद ' ( सुसू. १५. ११ )
घाम न येणे, घाम कमी असणे.

**–क्षीण**–पु., स्वेदक्षयार्तः, द्र० ' स्वेद ' ( सुसू. १५.२९-३१ )

अतिघामाने क्षीण झालेला किंवा स्वेदाच्या क्षयाने क्षीण झालेला.

**-ज**-पु., प्राणि० भुवः शरीरस्य च संस्वेदादूष्मणो जातः, यथा कृमिकीटपिपीलिकादयः (सुसू. १.३०)

शरीर व जमीन यांच्या तापण्याने उष्णतेपासून झालेला. जसे कृमि, किडे, मुंग्या इत्यादी.

**-प्रवाहिन्**-वि., स्वेदं प्रवाहयितुं शीलमस्येति (सुउ. ३९.१७)

घामाचा प्रवाह असण्याचा स्वभाव. घाम फार असणारा.

**-बीभत्सता**-स्त्री., स्वेदेन घृणा, स्वेदजनिता जुगुप्सा (चसू. ५.९३)

घामाने किळस येणे.

**-भेद्**-पु., स्वेदप्रकाराः द्र० 'स्वेद' (अहसू. १७.१)

घाम आणण्याचे प्रकार.

**-मुख**-न., शारीर० लोमकूपम् (चसू., ७.४२)

केसाचे मूळ.

**-वहस्रोतस्**-न., शारीर० स्रोतो० स्वेदवहं स्रोतः द्र० 'स्रोतम्' (चनि. १.२०)

घामवाहक स्रोतस.

**-वाहिस्रोतस्**-न., शारीर० स्रोतो० स्वेदवहस्रोतस् (चवि. ५.२२) समानवायुस्थानम् (चचि. २८.८)

घामवाहक स्रोतसू स्वेदवाहक. समानवायूचे स्थान.

**-विधि**-स्त्री., वेदविधानामूस्वे (चसू. १.९०) उष्णतीक्ष्णस्निग्धसररूक्षसूक्ष्मद्रवस्थिरगुरूणि द्रव्याणि प्रायः स्वेदनीयानि स्वेदोपगानि वा उच्यन्ते (चसू. २२.१६) 'स्तम्भगौरवशीतघ्नं स्वेदनं स्वेदकारकम्' (चसू. २२.११) स्वेदभेदाः-अग्निस्वेदोऽनग्निस्वेदश्च स्वेदो द्विविधः; तत्राग्निस्वेद-स्त्रयोदशविधः-सङ्कर-प्रस्तर-नाडी-परिषेका-वगाहन, जेन्ताकोऽश्मघन-कर्षूकुटी-भू, कुम्भिक, कूप, होलाकाः- (चसू. १४.३९-४०) अनग्निस्वेदः-दशविधः-व्यायामोष्णसदनगुरुप्रावरणक्षुधाबहुपानभयक्रोधोपनाहातपैयुद्धानि (चसू. १४.६२) सुश्रुते तु चत्वारः स्वेदभेदा उपदिष्टाः- तापोष्णोपनाहद्रवस्वेदाः; तत्र तापोष्मस्वेदौ विशेषतः श्लेष्मघ्नौ उपनाहस्वेदो वातघ्नः, अन्यतरस्मिन् पित्तसंसृष्टे द्रवस्वेद इति, कफमेदोन्विते वायौ अनग्निस्वेदप्रकारैः स्वेदमुत्पादयेत्। चतुर्विधाः स्वेदाः पुनः सार्वदेहिको देहावयविकश्चेति द्विधा भिद्यते (सुचि. ३२.३,१४-१६) तीव्रमध्यमृदुभेदेन स्वेदस्त्रिविधः-तत्र महास्वेदो महाबले शीतजव्याधिपीडिते च, मध्यमबले मध्यमः, दुर्बले मृदुस्वेदः करणीयः। शीताभिर्मुक्तावलीभिः, शीतलैर्भाजनैः, जलार्द्रैर्जलजैर्हस्तैर्वा स्विद्यतो हृदयं स्पृशेत् (चसू. १४.५,८-१०) रूक्षस्निग्धभेदेन द्विविधः स्वेदः, वातरोगे स्निग्धस्वेदः, कफरोगे रूक्षस्वेदः, कफवातरोगयोरुभयविधस्वेदौ कर्तव्यौ आमाशयगते वाते रूक्षपूर्वः स्वेदः, पक्वाशयगते वाते स्नेहपूर्वः स्वेदो हितकरः (चसू. १४.६-७) स्वेदकालः-निवातेऽन्तर्बहिःस्निग्धो जीर्णान्नकाले स्वेदमाचरेत् (अहसू. १७.१२) स्वेदकार्यम्-अग्निदीप्तिः, मार्दवं, त्वक्प्रसादः, स्रोतोनिर्मलत्वं, जाड्यतन्द्रापहरणं, सन्धिस्तब्धतापहरणम् (असंसू. २६.१०) स्वेदो मार्दवकराणां श्रेष्ठः (असंसू. १३.३) सम्यक्स्वेदलक्षणम्-शीतशूलोपरमः स्तम्भगौरवनिग्रहो मार्दवोद्भवः (चसू. १४.११) मिथ्यास्वेदलक्षणम्-सम्यक् स्विन्नविपरीतलक्षणानि (सुचि. ३२.२३) स्वेदातियोगलक्षणम्-पित्तास्रकोपतृण्मूर्च्छास्वराङ्गसदनसन्धिपीडाज्वरश्यावरक्तमण्डलदर्शनच्छर्दिभ्रमाः (अहसू. १७.१६-१७) अतिस्विन्नचिकित्सा-ग्रैष्मिकविधिः-मधुरस्निग्धशीतलविधिः (चसू. १४.१३) तूर्णं शीतविधानं करणीयम् (सुचि. ३२.२४)

स्वेदविधानम्-येषां नस्यं बस्तिश्च विधातव्यं, ये च शोधनीयास्ते पूर्वं स्वेदनीयाः, हृतशल्योऽनुपद्रवा मूढगर्भा; काले सम्यक्प्रजाता पश्चात् स्वेद्याः, भगन्दरार्शोऽश्मरीपीडिताः शस्त्रकर्मतःपूर्वं पश्चाच्च स्वेद्याः (सुचि. ३२.१७-१९) स्वेदनीयरोगाः -प्रतिश्यायकासश्वासहिक्कास्वरभेदगलग्रहार्दितैकाङ्गसर्वाङ्गपक्षाघातविनामकवातकोष्ठानाहविबन्धविजृम्भकपार्श्वपृष्ठकटीकुक्षिपादजानूरुजङ्घाग्रह गृध्रसीमूत्रकृच्छ्रमूत्राघातमुष्कमहत्त्वशोथखल्लीवेपथुवातकण्टकसंकोचायामस्तम्भगौरवसुप्तिशूलाख्या रोगाः (चसू. १४.२२-२४) अस्वेद्यरोगाः-कषायमद्यसेवनजन्यविकारा रक्तपित्तातिसारमधुमेहपित्तमेहगुददाहगुदभ्रंशविषजविकाराः स्थौल्यकाम-

**लोदराढ्यरोगक्षततिमिरादयो रोगाः श्रान्ततृषितक्षुधितक्रुद्धशोचदुर्बलविशुष्कक्षीणौजस्कगर्भिणीप्रभृतयो रोगिणः ( चसू. १४.१६-१९ ) तथैव पीतदुग्धदधिस्नेहमधुकाः कृतविरेचनाः पुष्पिता, सूता, स्तम्भनीयरोगाः, पित्तरोगिणश्च अस्वेद्याः ( अहसू. १७.२१-२४ )**

घाम काढण्याचा–शेकण्याचा विधि–उष्ण, तीक्ष्ण, स्निग्ध, सर, रूक्ष, सूक्ष्म, द्रव, स्थिर, गुरु द्रव्ये बहुधा घाम काढणारी–घाम काढण्यास मदत करणारी द्रव्ये होत. ताठरपणा, जखडणे, जडपणा व थंडी नाहीशी करणे व घाम आणणे ही कार्ये करणारे द्रव्य, स्वेदन द्रव्य होय. **घाम काढण्याचे प्रकार दोन**—(१) अग्निस्वेद (२) अनग्निस्वेद. **अग्निस्वेद तेरा प्रकारचा**—(१) संकर (२) प्रस्तर (३) नाडी (४) परिषेक (५) अवगाह (६) जेंताक (७) अश्म (८) घन (९) कर्षू (१०) कुटी (११) कुंभिक (१२) कूप आणि (१३) होलाक ही त्यांची नावे आहेत. **अनग्निस्वेद दहा प्रकारचा**—(१) व्यायाम (२) उष्ण घर (३) जड जाड पांघरूण (४) भूक (५) पुष्कळ मद्यपान (६) भय (७) क्रोध (८) पोटीस (९) उन्ह आणि १० वा युद्ध. **सुश्रुतात चार प्रकार**—(१) ताप (२) उष्मा (३) पोटीस व (४) द्रवस्वेद. यात ताप व उष्मस्वेद हे दोन स्वेद प्रकार विशेषतः कफघ्न आहेत. उपनाह स्वेद वातघ्न व द्रवस्वेद पित्तयुक्त कफ किंवा वात असता उपयुक्त. कफमेदोन्वित वातावर अनग्निस्वेद प्रकारानी घाम आणावा. स्वेदाचे जे चार प्रकार सांगितले त्याचेच आणखी दोन प्रकार. (१) सार्वदेहिक व (२) देहावयविक असे दोन प्रकार होतात. तीव्र, मृदु आणि मध्य असा पुन्हा तीन प्रकारचा स्वेद होतो. महा म्हणजे तीव्र स्वेद हा मोठ्या बलवान व्यक्तीला थंडीमुळे झालेल्या रोगाच्या पीडेमध्ये द्यावा. मध्यमस्वेद मध्यम बलवान मनुष्याला व मृदु दुर्बल मनुष्याला द्यावा. घाम काढताना रोग्याच्या हृदयाला थंड अशा मोत्याच्या माळांनी, थंड भांड्यानी, पाण्यातील ओल्या चिखल–कमळे इ० द्रव्यांनी किंवा ओल्या हातांनी हृदयाला स्पर्श करावा. पुन्हा रूक्ष व स्निग्ध असा दोन प्रकारचा स्वेद. वातरोगात स्निग्ध व कफरोगात रूक्ष तसेच कफवातरोगात दोन्ही प्रकारचा स्वेद ( शेक ) द्यावा. आमाशयगत वातात प्रथम रूक्ष नंतर स्निग्ध व पक्वाशयगत वातात प्रथम स्निग्ध व नंतर रूक्ष शेक हितकर असतो. **शेकाचा काळ व स्थळ**—निवाऱ्याच्या ठिकाणी अंतर्बाह्य स्निग्ध मनुष्याला अन्न जिरल्यावर स्वेदविधी करावा. **शेकाचा फायदा**—त्वचा निर्मल, मऊ व प्रसन्न होते; स्रोतसे मोकळी, निर्मल होतात; जखडलेले सांधे मोकळे होतात. जडपणा जाऊन शरीर हलके होते, झापड जाते व अग्नि प्रदीप्त होतो. स्वेद हा शरीर मृदु-मऊ करणाऱ्या सर्व उपचारांमध्ये श्रेष्ठ आहे. **घाम योग्य तितकाच निघाल्याचे लक्षण**–थंडी व शूल थांबणे, जखडणे व जडपणा नाहीसा होणे, मऊपणा येणे. **चुकीने शेकण्याचे अनिष्ट परिणाम**– वरच्या अगदी उलट होतात. **शेक अति झाला तर लक्षणे**-पित्त, रक्त यांचा प्रकोप, तहान भ्रम, मूर्च्छा, स्वर खोल जाणे अंग गळणे, सांध्यात पीडा, ज्वर, काळसर, लाल चकंदळे, ओकारी. **अति शेकण्याने होणाऱ्या पीडेवर उपचार**– उन्हाळ्यात जे उपचार आहार विहार करावयाचे असतात ते सर्व म्हणजेच गोड, स्निग्ध, थंड उपचार विशेषतः थंड उपचार शीघ्र करावे. **शेक कोणाला द्यावा.** –ज्याना नाकात औषध घालावयाचे बस्ति द्यावयाचा किंवा वामक रेचक इत्यादी देणे इष्ट असते त्यांना प्रथम शेक द्यावा. ज्याच्या शरिरातील शल्य काढले गेले आहे. किंवा कोणताही उपद्रव न झालेली पण गर्भ अडलेली स्त्री अथवा स्वाभाविक किंवा योग्य काली प्रसूत स्त्री यांना मागाहून शेक द्यावा. भगंदर, मूळव्याध, मूतखडा यांनी पीडित रोगी शस्त्रकर्माच्या पूर्वी व नंतर शेक देण्यास योग्य होत. घाम काढण्यास योग्य रोग पडसे, खोकला, श्वास, उचकी, आवाज फुटणे, गळा धरणे, तोंड वाकडे होणे, एकांग-सर्वांग पक्षाघात, अवयव वाकडे करणारा वात, पोटफुगी, मल मूत्र वात यांचा अवरोध, जांभया फार येणे, अंग बाहेर वाकडे होणे, फासळ्या-पाठ-कंबर-कूस-पाय-गुडघा-मांड्या-पिंढरी जखडणे, गृध्रसी, कष्टाने लघ्वी होणे, लघ्वी न होणे, अंड मोठे होणे, सूज, हात-पाय आत वाकडे होणे कंप, टाचेतील वेदना, अवयव आकुंचित होणे,

धनुर्वात, अंग ताठणे, जडपणा, स्पर्श न कळणे, शूल इत्यादी रोग. **घाम काढू नये असे रोग—** तुरट रसाच्या औषधानी सिद्ध केलेले मद्य सेवनजन्य विकार, रक्तपित्त, अतिसार, मधुमेह, पित्तमेह, गुददाह, गुदभ्रंश, विषजविकार, लठ्ठपणा, कावीळ, उदर, आढ्यवात, उरःक्षत, दृष्टिरोग, थकलेला, तहानेला, भुकेलेला, रागावलेला, शोकाकुल, दुर्बल, सुकलेला, ओज क्षीण झालेला, तसेच दूध दही स्नेह आसव प्यालेला, रेच झालेला, गर्भिणी, विटाळशी, बाळंतीण व इतर स्तंभन करण्यास योग्य असे रोगग्रस्त पित्त रोगी यांना शेक देऊ नये.

**–विवेचन**–न., **स्वेदपृथक्करणम्** ( सुशा ९.७ )
अन्न पचनानंतर मेदधातूपासून स्वेद ह्या त्याच्या मळाला वेगळा करणे.

**–स्रावण**–न., **स्वेदविस्रावणम्, स्वेदवहनम्** ( सुनि. १.१८ )
स्वेद ह्या मलाचे वहन करणे, घामाचा स्राव होणे, घाम निथळणे, घामाच्या धारा लागणे.
वि., **स्वेदं स्रावयति इति स्वेदस्रावणः** ( सुनि. १.१८ )
घाम काढणारे, घाम आणणारे.

**स्वेदन**–न., **घर्मोद्गमरूप उपक्रम० द्र० ' स्वेदविधि '** ( चसू. १४.१३ )
घाम आणणे हा उपचार. पहा 'स्वेदविधि.'
वि., **स्वेदयति इति स्वेदनमुष्णम्, उष्णस्वेदकरद्रव्यम्, कुक्कुटमदिराकुलत्थादीनि** ( चक्र. चचि. ३.२७१ )
उष्ण घाम आणणारे द्रव्य. कोंबडा, दारू, कुळीथ इत्यादी.
**संस्कार० मलशिथिलतापादनार्थं दोलायन्त्रे क्षारैरम्लैरितरैर्वा स्वेदनोपयोगिभिर्द्रव्यैर्द्रव्यस्य पाचनम्** ( र. ८.६२ )
पाऱ्यावरचा एक संस्कार. पाऱ्यातील मळ शिथिल व्हावेत म्हणून दोलायंत्रात क्षार अम्ल इतर स्वेदनोपयोगी द्रव्यांनी पारा उकळणे.
**त्र्यूषणलवणादिभिर्युक्ते दोलायन्त्रस्थिते काञ्जिके दिनत्रयमुत्क्वथनरूपः पारदसंस्कारः** ( र. ११.२६ )
सुंठ, मिरी, पिंपळी, (त्र्यूषण) सैंधव इत्यादी द्रव्ये घालून दोलायंत्रात कांजीत तीन दिवस उकळण्याचा पाऱ्याचा संस्कार.

**( स्वेदनी )**–वि., **स्वेदजननी** ( चचि. ३.१८३-८४ )
घाम काढणारी, घाम निर्माण करणारी. ( औषधी पेया ).

**–कर्म**–**उपक्रम० स्वेदविधिः** ( असंसू. २४.५-६ )
स्वेदनाचा विधी. घाम काढण्याचा विधी.

**स्वेदनी**–स्त्री.,
घाम काढणारी.

**–यन्त्र**–न., **यन्त्र० मुखबद्धवस्त्रोपरिस्थापिता द्रव्यपचनाय जलेन पूरिता स्थाली** ( र. ९.५ )
कपड्याने तोंड बांधलेली व कपड्याव रद्रव्ये पचनाकरिता ठेवून आत पाण्याने भरलेली थाळी.

**स्वेदनीय**–वि., **स्वेदसाध्यः द्र० 'स्वेद-विधि'** ( सुचि. ३२.२६ )
स्वेदाने साध्य. घाम काढण्यासारखे, घाम काढण्यास योग्य.

**स्वेदातियोग**–पु., **स्वेदस्यातियोगः द्र० ' स्वेद '** ( अहसू. १७.१६-१७ )
स्वाभाविक प्रमाणापेक्षा घाम अधिक येणे, अति घाम.

**स्वेदाध्याय**–पु., **अध्यायसंज्ञा०** ( चसू. १४.१ )
अध्यायाचे नाव. यात घामाबद्दलची माहिती आहे.

**स्वेदाबाध**–पु., **रोग० अति स्वेदरूपो व्याधिः** ( चसू. २१.४ )
फार घाम येणे हा रोग. घाम फार येण्याचा रोग.

**स्वेदाभिवहन**–न., **स्वेदवहनम्** ( सुशा. ९.९ )
घामाचे वहन करणे.

**स्वेदावचरणीय**–वि., **अध्यायसंज्ञा० स्वेदावचारणमधिकृत्य कृतः अध्यायविशेषः** ( सुचि. ३२.१ )
अध्यायाचे नाव. घाम काढण्याची माहिती यात आहे.

**स्वेदावचारण**–न., **स्वेदोपक्रम योजनम्** ( ड. सुचि. ३२.१ )
घाम काढण्याची योजना. घाम काढणे हा उपचार कसा करावा ही योजना.

**स्वेदावरोध**–पु., **लक्षण० स्वेदानिर्गमनम्** ( सुउ. ३९.१३-१४ )
घाम न येणे. घामाला अवरोध–अडथळा.

**स्वेदिन्**–वि., **स्वेदयतीति स्वेदी, घर्मोत्पादकः** ( अहसू. ६.२८-
घाम काढणारा. जो घाम काढतो तो.

**स्वेदोपगगण**-पु., द्रव्यगण० स्वेदनक्रियायां सहायत्वे नोपगच्छतीति स्वेदोपगः, महाकषायवर्गे एको गणः शोभाञ्जनकैरण्डार्कवृश्चीरपुनर्नवायवतिलकुलत्थमाबदराणीति दशेमानि स्वेदोपगानि द्रव्याणि भवन्ति (चसू. ४.१३)

घाम आणणाऱ्या द्रव्यांना मदत करणारा गण, घाम आणण्यास मदत करणारा गण. महाकषायवर्गातील एक वर्ग. शेवगा, एरंड, रुई, लाल पुनर्नवा, पांढरा पुनर्नवा, जव, तीळ, कुळीथ, उडीद, बोर हीं दहा द्रव्ये.

**स्वेद्य**-वि., स्वेदसाध्यः स्वेदनार्हः (चसू. १३.५२)

घाम काढल्याने जो साध्य होतो, घाम काढण्यास योग्य.

**हंस**–पु., पक्षि० तन्मांसं गुरूष्णस्निग्धमधुरं बलप्रदं बृंहणं शुक्रलं मारुतनाशनं च (चसू. २७.६६) हन्ति गच्छतीति हंसः ( चसू. २७.४१ ) असौ मानसालयः ( सुशा. ४.७२–७३; अहृसू. ७.१५ ध. ६.४५६; पृ. ४७८ )
हंस. हा मानस सरोवरात असतो. त्याचे मांस गोड, जड, उष्ण, स्निग्ध, पौष्टिक, शक्तिवर्धक, शुक्रवर्धक, वातनाशक असते.
**सूर्यः** ( र. १.८३ ) सूर्य.

**–घृत**–न., घृत० इदमूर्ध्वजत्रुरोगेषूपयुक्तम्, अतीव ऊर्ध्वगदापहमित्युक्तम् ( चचि. २६.१७५ )
एक औषधितूप. हे मान व डोके यांतील रोगावर अति उपयुक्त.

**–पदी**–स्त्री., वनस्पति० हंसपादी ( चचि. २६.२२०; ध. ४.१११ ) राजहंस.

**–पाक**–पु., खनिज० द्वयोरेकतरः प्रवालसदृशः श्वेतरेषो हिङ्गुलभेदः ( र. ३.१५५ )
हिंगुळाचा प्रकार. प्रवाळांसारखा पांढऱ्या रेषांचा हिंगूळ.

**–पाकयन्त्र**–न., यन्त्र० प्रथमं वालुकापूर्णं खर्परं विधाय तस्योपरि अपरं खर्परं स्थापयेत्। ततः द्वितीये खर्परे ऊर्ध्वमुखे शनैः मृदुवह्निना लवणं बिडं च पचेत्। अत्र अग्नितप्तवालुकया क्षारादीनां पचनमिति मन्दः स्वेदः कृतो भवति। युक्तमस्य यन्त्रस्य हंसपाकमिति नाम। हंसो हि मन्दगतिरेव ( र.९.३४–३५ )
एका खापरात वाळू भरून त्यावर दुसरे खापर ठेवावे, त्याचे तोंड वर असावे, त्यात मृदु अग्नीने लवण व बिड पचवावे. अग्नीने तापलेल्या वाळूने क्षारादिकांचे हळु हळु पचन होते. कारण अग्नी सौम्य-मंद असतो. हंस मंद गतीचा असल्यामुळे या मंदगतीने पचन करणाऱ्या यंत्रास हंसपाक म्हटले आहे.

**–पादिका**–स्त्री., वनस्पति० हंसपादी ( रा. ५.१६५; पृ. १५६ )
राजहंस, लाजाळु.



**–पादी**–स्त्री., वनस्पति०
( चसू. ४.१०; सुसू. ३८.४-५ ) गुणाः–कटुः शीतोष्णा रक्तप्रसादनव्रणरोपणरसायनकरी, दाहविसर्पविषभूतभ्रान्त्यपस्मारहरा च ( ध. ४.१११; पृ. १५६ )
हिं.—हंसपादी.
**म.—लाल लाजाळु.**
गु.—हंसराज काळी डांडलीनो.
बं.—गोयालेलता.
फा.—परस्या उशान.
लाल लाजाळु. **गुण**—तिखट, समशीतोष्ण, रक्तदोषनाशक, व्रण भरून आणणारी, धातुपरिपोषण सुधारणारी; दाह, धावरे, विष, भूतबाधा, भ्रांती, अपस्मारनाशक.
**वनस्पति० मण्डूकपर्णी** ( र. १९.१९८ ) ब्राह्मी.
**रक्तलज्जालुः** ( र. ११.९० ) लाल लाजाळू.

**–मण्डूरक**–न., योग० मण्डूरयोगः मंडूरत्र्यूषणत्रिफलामुस्तादिसाधितोऽयं पाण्डुरोगहलीमककामलोरुस्तम्भार्शांसि नाशयेत् ( र. १९.४५-४८ )
एक औषधियोग. मंडूर, त्रिकटु, त्रिफळा, नागरमोथा इत्यादिकांचा हा योग पांडुरोग, कावीळ, अति तीव्र कावीळ, ऊरुस्तंभ, मूळव्याध नाहीसे करतो.

**–माषा**–स्त्री., वनस्पति० माषपर्णी ( रा. ३.१७१; पृ. ३२ )
रानउडीद.

**–रुत**–न., हंसध्वनिः ( सुसू. २९.२७-३१ )
हंसाचा शब्द, ध्वनि, आवाज.

**हंसाङ्घ्रि**–स्त्री., वनस्पति० हंसपादी ( रा. ५.१६७; र. २२.१५९. पृ. १५६ )
लाल लाजाळू.

**हंसाण्ड**–पु., हंस्याः नाम वरटायाः अण्डम्, इदं वाजीकरणार्थमुपयुज्यते ( असंउ. ५० )
हंसीचे अंडे. विषयशक्ति वाढविते.

**हंसिर**–पु., मूषिक० तेन दष्टस्य लक्षणम्–अन्नविद्वेषः, जृम्भा रोम्णां हर्षणं च, तत्र सुवान्तः नरः आरग्वधादिकाथं पिबेत् ( सुक. ४.१४ )

एक उंदीर. तो चावला असतां जांभया, रोमांच व अन्नाचा द्वेष ही लक्षणे होतात. यावर चांगल्या वांतीनंतर बहावा इत्यादिकांचा काढा घ्यावा.

**हंसोदक**–न., **हंससेवायोग्यं उदकं हंसोदकम् 'दिव्यं खात्पतितम् तोयं नाम्ना हंसोदकं शिवम्'** (काखिल०) **दिवा सूर्यकिरणैस्तप्तं रात्रौ चन्द्रकिरणैः शीतीभूतमहोरात्रं चागस्त्योदयेन निर्विषं स्वच्छं च जातं जलम्** ( अहसू. ३.५२ )
हंसाला सेवन करण्यास योग्य जलं. आकाशातून पडलेले दिव्य जल दिवसा सूर्याच्या किरणानी तापलेले, रात्री चंद्रकिरणांनी थंड झालेले, अगस्तीच्या उदयाने निर्विष झालेले स्वच्छ जल हे हंसोदक होय.

**हठ**–पु., **अभूमिलग्नमूलस्तृणविशेषः** (सुसू. ४५.११ )
**वनस्पति० जलकुम्भिका** ( सुचि. २९.२९ )
जमिनीला न लागलेल्या मुळाचे एक गवत. जलकुंभिका.
**पारदगन्ध० सम्यक् शुद्धिमकृत्वा बंद्धः पारदः, असौ सेवितश्चेन्मृत्यवे कल्पते** ( र. ११.६६ )
पाऱ्याचा एक बंध. पाऱ्याची चांगली शुद्धि न करिता बद्ध केलेला पारा सेवन केला तर मृत्यु येतो.
न., **वनस्पति० शैवालम्** ( र. ३०.४५ ) शेवाळ.

**हठाग्नि**–पु., **वैक्रान्तादिसत्वपातनक्षमतापयुताग्निः, तीव्राग्निः** ( र. २.७१-७३ )
तीव्र अग्नि. तोरमल्ली इत्यादींचे सत्वपातन करू शकणारा तीव्र अग्नि.

**हण्डिका**–स्त्री., **आयतमुखं बृहन्मृत्तिकाभाण्डम्** ( र.३.१३९ )
पसरट तोंडाचे मातीचे मोठे भांडे.
**–यन्त्र**–न., **यन्त्र० डमरुयन्त्रम्, द्र० 'डमरुयन्त्र'** ( र. १३.५३ )
डमरुयंत्र.

**हत**–वि., **ताडितः** (सुचि. २.७७) ताडन केलेला,मारलेला.
**–चूर्णक**–पु., **खनिज० गौरीपाषाणभेद० सोमलप्रकारः** ( र. ३.१३८; ध. परि. ६.१४ पृ. २९० )
सोमलाचा प्रकार.
**–नामन्**–न., **रोग० अर्शांसि** ( असंचि. १० )
मूळव्याध.
**–प्रभ**– वि., **लक्षण० हतशरीरदीप्तिः** ( ड. ) **हतेन्द्रियशक्तिकः** ( सुउ. ३९.९३ )
शरिराचे तेज नष्ट झालेला. इंद्रियांची शक्ति नष्ट झालेला.
**–मांससिर**–वि., **लक्षण० नष्टं मांसं शिराश्च यस्मिन् सः**, ( **कर्दमविसर्पः** ) ( सुनि. १०.५ )
ज्यात मांस व शिरा नष्ट झाल्या आहेत असा धावरे रोग. ( कर्दमविसर्प. )
**–रव**–वि., **लक्षण० हतस्वनः ऊर्ध्वश्वासातुरः** ( ड. सुउ. ५१.१३ )
स्वर नष्ट झालेला. बोल निघत नाही असा. ( ऊर्ध्वश्वासी. )

**हताधिमन्थ**–पु., **नेत्ररोग० वायुः सिराणामन्तःस्थितः दृष्टिं प्रतिक्षिपन् हताधिमन्थं जनयेत्, एषा असाध्यः, उपेक्षिताधिमन्थजनितोऽसौ अनेकविधवेदना युक्तो दृष्टिहरव्रणोपेतश्च जायते। द्र० 'नेत्ररोग.'** ( सु. उ. ६.२४ )
अधिमंथ या डोळ्याच्या रोगाची उपेक्षा केल्याने हा होतो. अनेक प्रकारच्या वेदना, व्रण असतात. तो दृष्टि हरण करतो. सिरातील वायु दृष्टीची दुष्टि करून हताधिमंथ करितो. हा असाध्य आहे.

**हतेन्द्रिय**–वि. **लक्षण० हतश्रोत्रचक्षुरादिरादिशक्तिकः** ( **गम्भीरज्वरार्तः** ) (ड. सुउ. ३९.९३ ।
डोळे, कान इत्यादी इंद्रियांची शक्ति नाहीशी झालेला ( गंभीर ज्वराचा रोगी)

**हतौजोज्वर**–पु., **सान्निपातिकज्वरलक्षण० अस्मिन् पित्तानिलसमुच्छ्रयेणोजोविस्रंसनं भवति। गात्रस्तम्भेन शीतेन च ज्वरितोऽचेतनः निद्रेच्छुस्तन्द्रालुरनियतजाग्रत्स्वप्नो भवति ) तथा च रोमाञ्चितवपुरङ्गसादयुक्तो मन्दसन्तापो मन्दवेदनश्च भवति ज्वरितः। एतादृशं हतौजसं वा ओजोनिरोधजं जानीयात्** (सुउ.३९.४३-४५)
सांनिपातिकज्वरलक्षण– या ज्वरात पित्त ) आणि वात वृद्धीमुळे ओजोनाश होतो. अवयव ताठतात. थंडीमुळे हा रोगी अचेतन होतो. झोपेची इच्छा, डोळ्यावर झापड असते, जागणे किंवा झोंपणे अनियमित असते, अंगावर रोमांच येतात, अंग गळते, ताप थोडा व वेदनाही सौम्य अशा लक्षणांनी युक्त ह्या ज्वराला हतौजस किंवा ओजोनिरोधज ज्वर म्हणतात.

**हनु**–पु., **मुखसन्धिः** ( सुसू. १८.१८ ) **चिबुकम् मुखावयवः** ( सुशा.५.१९ )

तोंडाचा सांधा, हनुवटी, तोंडाचा एक अवयव.
**भैषज्य० नखम्** (ध. ३.५८; पृ. १०७) नखला.

**–कम्प**–पु., लक्षण० **हनुचलनम्, विषदष्टे लक्षणमेकम्** (चवि. २३,२२९)
हनुवटी कापणे. विषारी दंशातील एक लक्षण.

**–ग्रह**–पु., लक्षण० **संवृतविवृतमुखत्वोभयलक्षितो हनुस्तम्भः** (चचि. २८.४९; सुनि. १.५३; चसि. २.२२; अहसू. १७.२०)
हनुवटी जखडणे. तोंड मिटलेल्या व तोंड उघडलेल्या अशा दोन्ही अवस्थात हे लक्षण दिसू शकते. हनुवटी स्तंभित होणे–तिची हालचाल बंद होणे.

**–भेद**–पु., लक्षण० **हनोः भेदवद् वेदनाविशेषः** (चसू. २०.११)
हनुवटी फुटल्याप्रमाणे वेदना.

**–मूलबन्धन**–न., अस्थि० **द्वे हनुमूलबन्धने। द्र० 'अस्थि'** (चशा. ७.६)
शंखास्थीशी संबद्ध हनुवटीचे मुळातले बंधन. ही दोन.

**–मोक्ष**–पु., हनुसंधिविश्लेषः (सुनि. १६.३५) **लक्षणम्–वातेन तैस्तैर्भावैः हनुसंधिः विसंहतो भवेत्। स हनुमोक्षो नाम व्याधिरर्दितलक्षणवान् ज्ञेयः** (सुनि.१६.३५) **तस्य चिकित्सा–वातार्दितोक्तां मस्तिष्कशिरोबस्तिनस्यधूमोपनाहादिकां द्विविधामपि क्रियां कुर्यात्** (ड. सुचि. २२.४१)
हनुवटी निखळणे. सांध्यातून सुटणे. त्या त्या कारणांनी वाताने हनुवटी सांध्यातून विलग होते. ह्या रोगात अर्दित रोगाची लक्षणे असतात. उपचार अर्दितावरचे. डोक्याचा बस्ति, नाकात औषधे, धूम्रपान, शेकणे, इत्यादी अनेक उपचार करावे.

**–संहनन**–न., लक्षण० **हनुसंहतिः सरणाभावः** (ड. सुचि. ३४.१२) **तस्य चिकित्सा–वमनातियोगे क्वचित् हनुसंहननं भवति। हनुसंहनने वातश्लेष्महरं नस्यं स्वेदांश्च विदध्यात्** (सुचि. ३४.१२)
हनुवटी घट्ट होणे, न हालणे. वांती फार प्रमाणात झाल्याने क्वचित असे होते. उपचार– वातकफहारक नाकात औषध व शेक करावेत.

**–संग्रह**–पु., लक्षण० **हनुग्रहः** (चसू. ५.५९)
हनुवटी जखडणे. हनुवटी धरणे.

**–स्तम्भ**–पु., लक्षण० **हनोः स्तम्भः, तत्र चिकित्सा–प्रधमनैस्तीक्ष्णैश्चूर्णैः शिरो विरेचयेत्** (सुक. ५.४२-४३; अहसू. ७.२१)
हनुवटीची हालचाल बंद होणे. उपचार–डोक्याचे रेचक. तीक्ष्ण औषधी चूर्ण नाकात घालून डोक्याची शुद्धि करावी.

**–स्रंस**–पु., रोगः० वातव्याधि; **जिह्वातिलेखनात् शुष्कभक्षणात् अभिघातात् हनुमूलस्थः कुपितो वातः हनू स्रंसयित्वा विवृतास्यतां संवृतास्यतां वा करोति। तेन चर्वणभाषणादि कृच्छ्राद्भवति** (असंनि. १५.३२)
हनुवटी निखळणे. जीभ खूप घासणे. शुष्क पदार्थ अतिप्रमाणात खाणे, आघात यांनी हनुवटीच्या मुळातील वात प्रकुपित होऊन हनुवटी निखळून तोंड उघडेच ठेवतो, किंवा तोंड मिटले ही जाते. त्यामुळे चावणे, बोलणे इत्यादी क्रिया कष्टाने होतात.

**हनुकास्थि**–न., अस्थि० **हन्वस्थि** (सुचि. २२.२८)
हनुवटीचे हाड.

**हन्वस्थि**–न., **हनुभागे स्थितमस्थि, एकं हन्वस्थि** (चशा. ७.६) **द्र० 'अस्थि'**
हनुवटीचे हाड. हनुवटीत असलेले एक हाड.

**हपुषा**–स्त्री., वनस्पति० **गुणाः–कटुस्तिक्तोष्णा गुरुर्वातकफघ्नी अर्शोगुल्मशूलजन्तुप्लीहोदरविबन्धप्रदविड्बन्धकरी** (सुउ. ५२.३८; ध. २.९; पृ. ७०)
हिं.—हौहवेर.
म.—**शेरणी.**
गु.—शेरणी.
बं.—हबुषा.
शेरणी. **गुण**—तिखट, कडु, उष्ण, जड, वातकफनाशक; मूळव्याध, गुल्म, शूल, जंतु, उदर, प्लीहोदर, अवरोध, प्रदर नाशक.

**हपुषाद्यघृत**–न., घृत० **वातगुल्मे उपयुक्तः** (चचि. ५.७१-७३)
शेरणी हे द्रव्य मुख्य असलेले सिद्ध घृत. वातगुल्मात उपयोगी.

**हपुषाद्यचूर्ण**–न., योग० **उदरघ्नः** (चचि. १३.१३३-३६)
शेरणी हे द्रव्य मुख्य असलेले चूर्ण. उदररोग नाशक.

**हय**–पु., पशु० **अश्वः** (चसू.१.९४ र. ५.२१) घोडा.

**(हयी)**–स्त्री., वनस्पति० **अश्वगन्धा** (रा. ४.४०० पृ. ६२)
अश्वगंधा, आसकंद.

**–गन्धा**–स्त्री., वनस्पति० **अश्वगन्धा** ( चचि. २८.१७३ ) ( रा. ४.४०१ पृ. ६२ )
आसकंद.

**–घ्न**–पु., वनस्पति० **करवीरः** (रा. १०.१; पृ. १३४)
कण्हेर.

**–पुच्छिका**–स्त्री., वनस्पति० **माषपर्णी** ( रा. ३.१७० पृ. ३२ )
रानउडीद.

**–प्रिया**–स्त्री., वनस्पति० **अश्वगन्धा** ( रा. ४.४०२; पृ. ६२)
आसकंद.

**–भक्षा**–स्त्री., वनस्पति० **पिण्डखर्जूरी** ( ध. ५.५५; पृ. १७२ )
पेंडखजूर.

**–मार**–पु., वनस्पति० **करवीरः** (ध. ४.१ पृ. १३४ )
कण्हेर.

**–मारक**–पु., वनस्पति० **करवीरः** ( चसू. ३.१४ )
**असौ पक्कशोथस्य दारणं करोति** ( सुसू. ३७.१० )
कण्हेर. ही पिकलेली सूज फोडते.

**हयारि**–वनस्पति० **करवीरः** ( रा.१०.२पृ.१३४) कण्हेर.

**हयाह्व**–पु., वनस्पति० **अश्वगन्धा** (असं रक्तपित्त चि. ३)
आसकंद.

**हयेष्ट**–पु., वनस्पति० **यवः** ( रा. १६.१२४; पृ. २२३ )
जव.

**हर**–पु., **शङ्करः** ( मानि मधुकोश ) शंकर.

**–तेजस्**–न., खनिज० **पारदः** ( रा. १३.४२; पृ. २१४ र. ५.१३८; )
पारा.

**–प्रिय**–पु., वनस्पति० **करवीरः** ( रा. १०.३; पृ. १३४ )
कण्हेर.

**–वल्लभ**–पु., वनस्पति० **धत्तूरः** (ध. ४.७; पृ. १३५)
धोतरा.

**–वीर्य**–न., खनिज० **पारदः** (र. २०.३१-३२) पारा.

**–सृष्टि**–पु., खनिज० **पारदः** ( र. १.६० ) पारा.

**हरण**–न., उपक्रम० **शोधनम्** ( चनि. २.१६ )
हरण करणे, शोधन करणे.

**हराक्ष**–पु., वनस्पति० **रुद्राक्षः** ( रापरि. ११.१५; पृ. ३७४ )
रुद्राक्ष.

**हरि**–पु., **प्राचीनो रसाचार्यः** ( र. १७.१३६ )
प्राचीन रसशास्त्रवेत्ता.
वि., वर्ण० **हरितम्** ( सुउ. ४४.१२ ) हिरवा.

**–केशता**–स्त्री., लक्षण० **कपिलकेशता इदं वारुणकायलक्षणान्यतमम्** ( सुशा. ४.८३ )
पिंगट केस. हे वरुणकाय मनुष्याचे एक लक्षण.

**–क्रान्ता**–स्त्री., वनस्पति० **विष्णुक्रान्ता** ( रा. ५.१७३; पृ. १५७; र. ११.११७ )
विष्णुकांता.

**–गन्ध**–न., वनस्पति० **हरिचन्दनम्** ( रा. १२.१९; पृ. ९५ ) पिवळे चंदन.

**–( गन्धा )**–स्त्री., वनस्पति० **अश्वगन्धा** ( सुउ. ३५.४ ) आसकंद.

**–चन्दन**–न., वनस्पति० **चन्दनभेदः गुणाः–तिक्तं शीतं पित्तघ्नमाटोपदवथुश्रमशोषाग्निमान्द्यतापहरम्** ( रा. १२.१९; पृ. ९५ )
हिं.—सफेत चन्दन.
**म.—सफेत चन्दन.**
पांढरे चंदन. गुण–कडु, थंड, पित्तनाशक, गुडगुड डोळे इत्यादींचा दाह, थकवा, शोष, अग्निमांद्य, दाह नाशक.
**श्वेतचन्दनम्** ( चशा. ८.९; सुउ. ४७.५९ )
**रक्तचन्दनम्** ( ध. ३.४; पृ. ९४ )
पांढरे चंदन, तांबडे चंदन.
वनस्पति० **कालीयकम्** ( ध. ३.८; पृ. ९५ )
पिवळे चंदन.

**–जात**–पु., वनस्पति० **खदिरः** ( र. ७.१२ ) खैर.

**–दर्भ**–पु., वनस्पति० **शरः** (रा. ८.२०९; पृ. १६१)
शर, बाण ( गवत ).

**–दल**–न., खनिज० **हरितालम्** (र. २०.५३) हरताळ.

**–द्रु**–पु., वनस्पति० **गुणाः–तिक्तः शीतलः वान्तित्वग्दोषनाशनः मङ्गल्यः पित्तहरः** ( रापरि. ९.२६; पृ. ३६६ )
दारुहळद–कडु, थंड, वांती, त्वचेचे दोष नाशक, पित्तहारक, मंगल.

**–नेत्र**–न., वनस्पति० **पुण्डरीकम्** ( ध. ४.१४८; पृ. १६४ )
पुंडरीक कमळ.

**–पर्ण**–न., वनस्पति० **मूलकम्** (ध. ४.३३.; पृ. १४०)
मुळा.

**-प्रभत्व**-न., वर्ण० **कपिलत्वम्** ( चचि. २६.१३२ ) पांढरेपणा.

**-प्रिय**-पु., वनस्पति० **कदम्बः**(ध. ५.१०५; पृ. १९०) कळंब.

**भैषज्य० शङ्खः** ( रा. १३.२४४; पृ. १३० ) शंख.

**वनस्पति० भृङ्गराजः** (रा. ४.२१; पृ. १३६) माका

**बन्धूकः** ( रापरि. १०.३५; पृ. ३७० ) दुपारी; काळी, पांढरी, पिवळी, लाल अशी चार. प्रकारची.

**विष्णुकन्दः** ( रापरि. ७.४०; पृ. ३५० ) विष्णुकंद. दीर्घवर्तुलाकार, पुष्कळ पुटांचा मोठा पाण्यात होणारा कंद.

न., **वनस्पति० उशीरम्** ( रा. १२.२५; पृ. ९६ ) काळा वाळा.

**(-प्रिया)**-स्त्री., वनस्पति० **खर्जूरी** ( रा. ११.६५; पृ. १७८ ) खजूर.

**तुलसी** ( रा. १०.७८; पृ. १४४ ) तुळस.

**-मन्थज**-न., शाक० **चणकपत्रम्** (सुसू.४६.२७७) हरभऱ्याची पाने.

**-लता**-स्त्री., वनस्पति० **गुडूची** ( र. १४.७१ ) गुळवेल.

**-वल्लभ**-पु., वनस्पति० **मुचकुन्दः** (रापरि. १०.२५,पृ. ३७० ) पुष्कळ सुरेख पानांचा, सुगंधी फुलांचा व लाल फळांचा वक्ष.

**( -वल्लभा )**-स्त्री., वनस्पति० **जपा** ( रापरि. १०.३९;पृ. ३७१ ) जास्वंद.

**-वालुक**-न., वनस्पति० **एलवालुकम्** ( ध. ३.७६;पृ. १११ ) एक सुगंधी द्रव्य.

**-वास**-पु., वनस्पति० **भृङ्गराजः** ( रा. ४.२१;पृ. १३६ ) माका, भांगरा.

**-वृक्ष**-पु., वृक्ष० **इन्द्रवृक्षः** ( सुचि. ११.१० ) धावड्या सारखा एक वृक्ष.

**-शंकर**-पु., पारदयोग० **पारदाभ्रकभस्मनी तुल्ये आमलकीकाथेन सप्ताहं भावयेत् । असौ माषमात्रो-पसेवितः सन् नीलमेहघ्नः** ( र. १७.१४४ ) पारा अभ्रक समप्रमाण आवळकाठीच्या भावना एक आठवडा द्याव्या. एक मासा मात्रेने सेवन केल्याने नीलमेह जातो.

**हरिण**-पु., जाङ्गलमृग० **असौ ताम्रवर्णः** ( चक्र. चसू. २७.४६; अहसू. ६.४३ ) झाडी कमी असलेल्या भागातला हरिण. हा तांबडा असतो.

**(हरिणी)**-स्त्री., वनस्पति० **मञ्जिष्ठा** (रा.६.१५; पृ.१०) मंजिष्ठ.

**पीतयूथिका** ( इन्दु. असंउ. ४३; ध. ५.१४९ ) द्र० **'यूथिका'** पिवळी जाई.

**हरित्**-न., वनस्पति० **हरिद्रा** ( रा. ६.७९ ) हळद.

**-पर्ण**-न., वनस्पति० **मूलकम्** ( रा. ७.५१ ) मुळा.

**( हरिन् )-मणि**-पु., रत्न० **मरकत** ( ध. ६.४९ ) पाच, पाचू, मरकत.

**-मुद्ग**-पु., वनस्पति० **मुद्गभेदः** द्र० **'मुद्ग'** ( रा. १६.१३०; ध. ६.८१ ) हिरवा मूग.

**( हरिल् )-लोमन्**-वि., लक्षण० **कपिलकेशः** ( इ. असंउ. २८ ) पिंगट केसांचा.

**-नेत्र**-न., लक्षण० **लोचनस्य हरितत्वम्** ( चसू. स्त्री., २०.१४ ) डोळ्यांचा हिरवेपणा.

**-पत्रिका**-स्त्री., वनस्पति० **पाची** ( रापरि. १०.४६; पृ. ३७१ ) पाचू, पाच.

**-मूत्र**-न., लक्षण० **मूत्रस्य हरितत्वम्** (चसू. २०.१४) पिंगट लघ्वी.

**-लता**-स्त्री., वनस्पति० **पाची** (रापरि. १०.४६; पृ., ३७१) पाच, पाचू.

**-वर्ग**-पु., आहारोपयोगी वर्ग० **आर्द्रकजम्बीर-मूलकसुरसायवानीधान्यकगृञ्जनकपलाण्डुलशुने-त्यादि द्रव्याणि हरितान्येव प्रायः भोजने भोजनस्य प्राक् पश्चाद्वा उपयुज्यन्ते । अतः इमानि द्रव्याणि हरितानीत्युच्यन्ते** ( चसू. २७.१७७ ) हिरवा वर्ग, कच्चा वर्ग. हा आहारात अगोदर किंवा मागाहून कच्चा खाण्यासारखा असतो. आले, लिंबू, मुळा, तुळशी, ओवा, कोथिंबीर, गाजर, कांदा,

लसूण इ० हा हिरवा कच्चा खाण्यासारखा म्हणून हरितवर्ग.

**-वर्चस्त्व**-न., लक्षण० विशः (विष्ठायाः) हरितत्वम् ( चसू. २०.१४ ) हिरवट विष्ठा-मळ.

**-शाक**-पु., वनस्पति० शिग्रुः (ध. ४.३९; पृ.१४२) शेवगा.

**-हारिद्रनेत्रत्व**-न., लक्षण० नेत्रस्य हरितहारिद्र-वर्णयुक्तत्वम् (असंसू. २०.१४ )
हिरवट, पिवळट डोळे होणे. डोळ्याचे हिरवट पिवळट वर्णयुक्तत्व.

**-हारिद्रमूत्रत्व**-न., लक्षण० मूत्रस्य हरितहारिद्र-वर्णत्वम् ( असंसू. २०.१४ )
हिरवट पिवळट रंगाचे मूत्र असणे.

**-हारिद्रशकृत्त्व**-न., लक्षण० शकृतः हरितहारिद्र-वर्णत्वम् ( असंसू. २०.१४ )
हिरवट पिवळट मळ असणे. मळाचे हिरवट पिवळट वर्णयुक्तत्व.

**हरित**-पु., वनस्पति० पलाण्डुः ( ध. ४,७१; पृ. १४८ ) कांदा.
**मुद्गः** ( ध. ६८१; पृ. २२४ ) मूग.
**मन्थानकः** ( रापरि. ८.५५; पृ. ३६२ )
बळकट मुळ्यांचे एक चांगले गवत.
पु., **पक्षि० प्रतुदविशेषः** ( ध. २.१२; पृ. २८६ ) द्र० 'प्रतुद'
चोचीने टोचून खाणारा पक्षी.
न., **वनस्पति० स्थौणेयकम्** (ध. ३.६९; पृ. ११०) गंठीवन, गठोणा.
**कुरी** ( रा. १६.१७९; पृ. २३० )
यमुनातीरावरील प्रसिद्ध तृण धान्य.
**नीलदूर्वा** ( ध. ४.१४३; पृ. १६३ ) द्र० 'दूर्वा' निळी दूर्वा.

**( हरिता )**-स्त्री., **वनस्पति० काश्मरी** ( रा. ११.७७; पृ. १८० ) शिवण.
**हरिद्रा** ( ध. १.५४; पृ. १७ ) हळद.
**बलामोटा** ( धपरि. ४.१; पृ. १६८ )
सूक्ष्ममुळांची वनस्पती.
**दूर्वा** (रा. ८.२२६; पृ. १६३) दूर्वा.

**-त्व**-न., **वर्ण० हरितवर्णत्वम्** ( चनि. १.२४ )
हिरवा रंग असणे, हिरवेपणा.

**हरितक**-पु., कुठेराद्यः शाकवर्गः ( चक्र. चसू. १८.६; सुचि. २३.४; सुसू. १९.१६ ) द्र० ' हरितवर्ग '
हिरव्या-कच्च्या द्रव्याचा वर्ग. तुळस अजवला इत्यादिकांचा वर्ग.

**हरितकाख्यवर्ग**-पु., हरितवर्गः ( असंसू. ७ )
हिरव्या-कच्च्या द्रव्याचा वर्ग.

**हरिताल**-न., खनिज० पीतवर्णमिदम् ( ध. ७.११९; पृ. ३१५ ) गुणाः—कटु कषायमुष्णं स्निग्धं पुष्पहृत दीपनकरं वातघ्नं कुष्ठविषकण्डूभूतकेशहृत् वर्णकरं च ( ध. ७.११९; पृ. ३१५ ) भेदाः— पत्रतालं पिण्डतालकं चेति ( र. ३.७४ ) तस्य शोधनम्—कूष्माण्डस्वरसे तथा तिलक्षारजले अथवा सुधासहिते जले स्विन्नं हरितालं शुद्धं भवति। तस्य दोलायन्त्रद्वारा स्वेदनं कार्यम् ( र. ३.७८ ) तस्य मारणविधिः—प्रथमं तालकं क्षौद्रवत् घनत्वमापन्ने पलाशमूलजे कषाये त्रीन् वारान् भाव्यम्। अनन्तरं माहिषे मूत्रे मर्दनं कार्यम्। ततः शरावसंपुटे कृत्वा दशसंख्याकैर्वनोपलैः पुटं देयम्। अथ पुटनानन्तरमपि पेषणं कार्यम्। एवं द्वादशवारं पाच्यं; प्रतिपुटं भावनापि देया। ततः शुद्धं सत् योगेषु प्रयोज्यम्। ( र. ३.८२-८३ ) तस्य सत्वपातनम्—तालं टङ्कणं च प्रथमतः समानं ग्राह्यम्। कुलित्थक्वाथमहिष्याज्यमधुभिरनन्तरं भावना देया। ततः एतैर्भावितं तालं स्थाल्यां क्षिप्त्वा सच्छिद्रेण शरावेण सम्यक् निरोधं कृत्वा मृदुमध्यादिक्रमपरिवर्धितं वह्निं ज्वालयेत् ( र. ३.८४-८६ ) तस्य उपयोगः- गोमूत्रसंयुक्तमातपे त्र्यहं शोषयेत्। एतद् बृंहणं विषं, विषस्यादौ प्रशस्तम्। वातज्वरे मस्तुना, पित्तज्वरे क्षीरेण, कफज्वरे गोमूत्रेण, सन्निपातजे ज्वरे त्रिफलाम्भसा प्रयोज्यम् ( असंउ. ४८ ) एतत्सेवनातिमात्रेण हृदि दाहः, रसाग्रहः, आनाहः, अम्लवमनं पीतहरिद्रविट्स्रुतिः मण्डलिसर्पदष्टोक्तविकाराश्च भवन्ति ( असंउ. ४० ) अशुद्धं तालं आयुर्हानिकरं कफमेहकृत् वातमेहकृत् शरीरमानसतापकृच्च भवति। तथा तत्स्फोटमङ्गसंकोचं च कुरुते ( र. ३.७९ ) कुष्ठघ्नमेतत् ( चचि. ७,१४४ ) अर्शांसि प्रलेपार्थमुपयुक्तम् ( चचि. १४.५६ ) तस्य चूर्णमुपदंशविसर्पाणां शान्तिकरम् ( सु. १९.४६ ) तच्च स्निग्धं कषायकटुकं विषप्रणुच्च ( असंसू. १५.२४ ) व्रणसंशोधनवर्तिः तैलघृतेषूपयुज्यते ( सुसू. ३७.१३-१५ )

धातुविषभेदो वर्तते ( सुक. २.५ ) मूर्धविरेचने धूमप्रयोगे एकं द्रव्यम् ( चसू. ५.२६ )
हिं.—हरताल.
**म.—हरताळ.**
गु.—हडताल.
बं.—हरिताल.
**हरताळ गुण**—तिखट, तुरट, स्निग्ध, उष्ण, रजःस्राव बंद करणारा, अग्निदीपक, वातनाशक, कुष्ठ, विष, कंडू, भूतबाधा, केशनाशक, वर्ण चांगला करणारे आहे. प्रकार–१ पत्री किंवा वर्खी हरताळ आणि २ पिंड हरताळ. शुध्दी–कोहळ्याच्या रसात, तिळाच्या क्षाराच्या पाण्यात किंवा चुन्याच्या पाण्यात शिजवल्याने शुद्ध होतो. दोलायंत्राने शिजवावा. **मारण**—प्रथम पळसाच्या मुळांचा काढा मधासारखा दाट करून त्यात हरताळ खलावा. अशा तीन भावना द्याव्या. नंतर म्हशीच्या मूत्रात खलावा. नंतर दहा शेणींचे पुट द्यावे. प्रत्येक पुटानंतर पुन्हा पळसाच्या मुळाच्या काढ्याची व म्हशीच्या मुताची भावना देऊन खल करावा. या प्रमाणे बारा वेळा पुटे द्यावीत. नंतर ते शुद्ध होऊन योगामध्ये वापरण्यासारखे होते. **सत्वपातन**– हरताळ व टाकणखार प्रथम समभाग घेऊन त्यांना कुळथाचा काढा, म्हशीचे तूप, मध यांच्या भावना द्याव्यात. नंतर एका परळात घालून व छिद्रयुक्त परळ झाकून मातकापड करून त्याला क्रमाने मृदु, मध्य, व तीव्र अग्नी द्यावा. **उपयोग**–नंतर ते गोमूत्रात तीन दिवस उन्हात ठेवावे व सुकवावे. हे शरिराला पौष्टिक विष होते. हे विषबाधा झालेल्यास प्रथम द्यावे. वातज्वरावर दह्याची निवळ, पित्तज्वरावर दूध, कफज्वरावर गोमूत्र, सन्निपातज्वरावर त्रिफळेचा काढा यांबरोबर द्यावे. याचे अतिसेवन झाले तर हृदयात दाह, रसांची इच्छा, पोटफुगी, आंबट ओकारी, पिवळा जर्द, पातळ जुलाब व घणस चावल्यावर होणारी लक्षणे होतात. अशुद्ध हरताळ आयुष्याची हानी, कफ, पित्त, प्रमेह आणि शारीर व मानस संताप करणारे असते. तसेच अंगावर फोड व अवयवांचा संकोच करिते. हे कुष्ठघ्न, उपदंश, धावरेनाशक आहे. व्रणशोधन करावयाची वात, तूप, तेल यांतून उपयोगात आणावी. डोक्याचे रेचक म्हणून व धूम्रपानाकरिता उपयोगी. ते स्निग्ध, तुरट, तिखट, विषनाशक, मूळव्याधीवर लेपाकरिता उपयोगी. धातुविषाचा प्रकार आहे.

**हरिताश्म**–न., **खनिज० तुत्थकम्** ( रा. १३.२०५; पृ. १२४ )
हिरवा दगड, मोरचूद.

**हरिद्रक**–पु., **कृतान्न० पीतभक्षः** ( इ. असंउ. ४ )
आहारातला बनवलेला एक पदार्थ. तीळ हळद घातलेला भात.

**हरिद्रा**–स्त्री., **वनस्पति० महाकषायवर्गे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.११ ) **विषघ्नगणे कुष्ठघ्नगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.११ ) **कन्दोऽयं वातसंशमनवर्गोक्तः** ( सुसू. ३९.७ ) **पीतवर्गीय वनस्पतिः** ( र. १०.९२ ) **व्यञ्जनोपयोगिनी एषा** ( र. ११.३७-३९ ) **कुष्ठादिप्रदेहे उपयुक्ता** ( चसू. ३.३ ) **पार्श्वरुजास्वालेपनार्थमुपयुक्ता** (चसू. ३.२५) **एषा प्रमेहहराणां श्रेष्ठा** (असंसू. १३) **पिष्ठमेहे उपयुज्यते** ( सुचि. ११.९ ) **सा त्रिविधा हरिद्रा, कर्पूरहरिद्रा, वनहरिद्रा चेति** (सुसू. १४.३५) **त्रिविधहरिद्रागुणाः–तिक्ता कटुरुष्णा वर्णकरी विशोधनी कफवातघ्नी विषकुष्ठव्रणकण्डूमेहकृमिपीनसारुचिरक्तघ्नी च** ( ध. १.५४ )
हिं.—हलदी.
**म.—हळद.**
गु.—हलदर.
बं—हलद.
ता.—मञ्चळ.
हळद. महाकषायवर्गातील एक, कुष्ठ फासळ्यात वेदना इत्यादिकांवर लेप देण्यास उपयुक्त. प्रमेह नाशक द्रव्यांत श्रेष्ठ. पिष्ठमेहात देतात. तीन प्रकार–हळद, कापूरहळद व रानहळद. सर्वांचे गुण–कडु, तिखट, उष्ण, वर्ण सुधारणारी, दोषशोधक, कफवातघ्न विष, कुष्ठ, कंडु, प्रमेह, कृमि, पडसे, अरुचि व रक्तदोषघ्नी.
**पिण्डहरिद्रा** ( सुउ. ४४.१७ ) गाठीहळद.

**–कृसर**–पु., **कृतान्न० हरिद्राभिधानः कृसरः** ( चक. १.१९ )
तीळ व हळद मिश्र भात; कृसर.

**–द्वय**–न., **हरिद्रा दारुहरिद्रा च** ( अहसू. १५.३५ )
हळद व दारूहळद.

**-मेह**-पु., पित्तनिमित्तः प्रमेहभेदः (चसू. १९.४(९) पित्तज प्रमेह. प्रमेहाचा प्रकार.

**हरिद्रादिगण**-पु., द्रव्यगण० हरिद्रादारुहरिद्राकलशी कुटजबीजानि मधुकं चेति, तद्गुणाः-स्तन्यशोधन आमातीसारशमनः आमसंसृष्टदोषाणां पाचनं कुर्वाणश्च ( सुसू. ३८.२७-२८; अहसू. १५.३५ ) हळद इत्यादी गण. हळद, दारुहळद, रिंगणी (वा पिठवण ) इंद्रजव व ज्येष्ठमध. गुण-अंगावरचे दूध शुद्ध करणारा, आमातीसारशामक, आमयुक्त दोषांचे पाचन करणारा.

**हरिद्रादिघृत**-न., घृत० पाण्डुरोगे उपयुक्तम् ( चचि. १६.५३ ) हळद वगैरे औषधांनी केलेले सिद्ध घृत. पांडु रोगावर उपयोगी.

**हरिद्रादियोग**-पु., योग० हरिद्रात्रिफलायोगः, पाण्डुरोगशमनः ( सुउ४४.१७ ) हळद, त्रिफळा यांचे केलेले औषध. पांडुरोगनाशक.

**हरिद्री**-स्त्री., वनस्पति० हरिद्रा ( रा. ६.७९; पृ. १८ ) हळद.

**हरीतकी**-स्त्री., वनस्पति० ( चसू. ४.१८ ) औषधे उपयोज्यम्, अङ्गं फलमेव, तद्भेदाः-विजया रोहिणी पूतनाऽमृताऽभया जीवन्ती चेतकीति हरीतक्याः सप्तजातयः । विन्ध्याद्रौ विजया, हिमालये चेतकी, सिन्धुदेशे पूतना, प्रतिष्ठाने रोहिणी, चम्पायाममृताऽभया च, सुराष्ट्रदेशे जीवन्ती उत्पद्यते । लक्षणानि-विजयाऽलाबुवृत्ता, रोहिणी वृत्ता, पूतना सूक्ष्मास्थिमती, मांसलाऽमृता, पञ्चरेखाऽभया, जीवन्ती स्वर्णवर्णिनी, त्रिरेखा चेतकीति सप्तानां हरीतकीनामाकृतयः । विजया सर्वरोगेषूपयुज्यते । रोहिणी व्रणरोहिणी, पूतना प्रलेपे योज्या, अमृता शोधनाय हिता, अक्षिरोगेऽभया शस्ता, जीवन्ती सर्वरोगहरा, चूर्णार्थे चेतकी शस्ता । सप्तानामपि जातीनां विजया प्रधाना। सा सर्वरोगेषु सुखप्रयोगा सुलभा च । हरीतक्याः पुराणोक्तोत्पत्तिः-इन्द्रस्यामृतं पिबतः यो बिन्दुः भूमौ पतितस्तस्मात् सप्तजातिर्हरीतकी समुत्पन्ना ( भा. प्र. हरीतक्यादिवर्गः ) तद्गुणाः-कषायाऽम्ला कटुका तिक्ता मधुरोष्णा लघुः स्वादुपाका चक्षुष्या लेखनी मेध्या हृद्येन्द्रियप्रसादनी वातपित्तकफघ्नी सन्तर्पणकारिणी प्रमेहकुष्ठव्रणच्छर्दिशोफवातरक्तमूत्रकृच्छ्रनाशिनी च ( ध. १.२०५; पृ. ४९ ) सा वयःस्थापनी पौष्टिक्यायुष्या दीपनी पाचनी बुद्धीन्द्रियबलप्रदा दोषानुलोमनी त्रिदोषविरेचनी च ( चचि. १.२५-३० ) वयःस्थापनगणे एकं द्रव्यम् ( चसू. ४.१८ ) महाकषायवर्गे कुष्ठघ्नगणे एकं द्रव्यम् ( चसू. ४.११ ) हिक्कानिग्रहणगणे एकं द्रव्यम् ( चसू. ४.१४ ) कासहरगणे एकं द्रव्यम् ( चसू. ४.१६ ) ज्वरहरगणे एकं द्रव्यम् ( चसू. ४.१६ ) पथ्यानां श्रेष्ठा ( चसू. २५.४० ) हरीतकी स्वादुतिक्तकषायत्वात्पित्तहृत्, कटुतिक्तकषायत्वात् कफहृदम्लत्वाद्वातहृच्च ( भा. प्र. मिश्रप्रकरण. ६.२३ ) चर्विता हरीतकी अग्निं वर्धयति । पेषिता मलशोधिनी, स्विन्ना संग्राहिणी, भृष्टा त्रिदोषनुच्च । भुक्तस्योपरि योजिता हरीतक्यन्नपानकृतान्दोषान्वातपित्तकफोद्भवांश्च विकारान् आशु हरति। लवणेन युक्ता सा कफं हन्ति। सशर्करा पित्तं हन्ति । घृतेन युक्ता वातजान् रोगान् हन्ति । गुडान्विता च सर्वरोगान् हरति ( भा. प्र. मिश्रप्रकरण. ६.३३ ) अध्वातिखिन्नो बलवर्जितो रूक्षः कृशो लङ्घनकर्शितः पित्ताधिको विमुक्तरक्तस्तथा गर्भवती नारी अभयां न खादेत् ( भा. प्र. मिश्रप्रकरण. ६.३६ )

हिं.—हरड.

**म.—हिरडा.**

गु.—हरडे.

बं.—हरीतकी.

ता.—करक्काय.

**हिरडा**—उपयोगी अंग, फक्त फळच, सात जाती. विंध्याद्रीत विजया, हिमालयात चेतकी, सिंधमध्ये पूतना, पैठणला रोहिणी, चंपारण्यात अमृता व अभया, काठेवाडात जीवन्ती होते. लक्षणे-विजया दुध्या भोपळ्यासारखी लंबगोल, रोहिणी गोल, पूतना लहान आठळीची,अमृता गर पुष्कळ असलेली,अभयेवर पाच रेषा असतात. जीवंती सोन्याच्या रंगाची, चेतकी तीन रेषांची असते. **उपयोग**—विजया सर्व रोगांवर उपयुक्त होते. रोहिणी व्रण भरून आणते, पूतना लेपास उपयुक्त, अमृता रेच होण्यास द्यावी. अभया डोळ्यांच्या रोगावर चांगली. जीवन्ती सर्व रोगांवर व चेतकी चूर्णाकरिता उपयुक्त. सर्वात विजया मुख्य, ती सर्व रोगांत सुखाने कार्यकारी व

सहज मिळणारी. ही एक पुराणकथा आहे. इंद्र अमृत पीत असताना जो बिंदू जमिनीवर पडला त्या पासून सात प्रकारचा हिरडा उत्पन्न झाला. **गुण**—तुरट, आंबट, तिखट, कडू, गोड, उष्ण, हलका, पचनानंतर गोड, हृदयाला हितकर, डोळे व धारणाशक्ति यांना बलकर, इंद्रियांना प्रसन्न ठेवणारा, दोष खरडून काढणारा, वातपित्तकफनाशक, दोषांना आपल्या मार्गाने घालविणारा, त्रिदोषरेचक, पौष्टिक; प्रमेह, कुष्ठ, व्रण, ओकारी, सूज, वातरक्त, कष्टाने लघ्वी होणे घालवितो. वयाला अनुरूप शरीर ठेवणारा, दीपक, पाचक, बुद्धि व इंद्रिये यांना बलदायक. वयानुरूप शरीर ठेवणाऱ्या गणांतील; तसेच मोठ्या काढ्यांतील कुष्ठनाशक, मूळव्याध नाशक, उचकी नाशक, खोकला नाशक, ज्वर हारक ह्या औषधिगणांतील एक द्रव्य. पथ्याच्या सर्व पदार्थांत श्रेष्ठ. हिरडा—गोड, कडू व तुरट रसाने पित्तनाशक, तिखट कडू, तुरट म्हणून कफनाशक, व आंबट रसाने वातहर. चावून खाल्ल्यास अग्नि वाढवितो. वाटून घेतला तर मळ शोधक, वाफवून घेतला तर मळ बांधतो व भाजून घेतला तर त्रिदोष नाशक. जेवणावर खाल्ला तर अन्नपानातील वातकफ पित्तापासून होणारे दोष नाहीसे करतो. सैंधवाबरोबर कफ नाशक. साखरेबरोबर पित्त व तुपाबरोबर वातजरोग नाशक. गुळाबरोबर सर्व रोग नाहीसे करतो. **वर्ज्य**— मार्ग चालून थकलेला, अशक्त, रूक्ष, कृश, लंघनाने क्षीण झालेला, पित्त अधिक असलेला, रक्तस्राव केलेला, तसेच गरोदर स्त्री यानी हिरडा खाऊ नये.

**-लेह**—पु., **अवलेह० श्वासकासयोरुपयुक्तः** ( चचि. १८.१६३ )

हिरडा वगैरे द्रव्यांचा लेह श्वास खोकल्यात उपयुक्त.

**हरीतक्यादि**—पु., **योग० त्रिफला हरीतक्यामलकी बिभीतकश्चेति योगघटकद्रव्याणि** ( सुचि. ७.२६ ) एक औषधि योग. हिरडा, आवळकाठी व बेहडा ही घटक द्रव्ये आहेत.

**हरीश्वर**—पु., **प्राचीनो रसाचार्यः रसरत्नसमुच्चयकर्ता** ( र. १.५-९ )

प्राचीन रसशास्त्रवेत्ता रसरत्नसमुच्चयकर्ता.

**हरेणु**—पु., **धान्य० वर्तुलकलायः शिम्बीधान्येष्वेकम्, स च मधुरः कषायः शीतो लघुः रूक्षणः, कफपित्तयोः शस्तः** ( चसू. २७.२८; असउं. १ )

आ. को. म. २१५

गोल वाटाणा. शेंगा धान्यातील एक. तो गोड, तुरट, थंड, हलका, रूक्ष, कफपित्तात चांगला.

**वनस्पति० सतीनः** (इ. असंउ. १) वाटाणा.

स्त्री., **वनस्पति० कलायः** ( ध.६.१०३; पृ. २२८ ) वाटाणा.

**धान्य० मसूरिका** ( ध. ६.९५; पृ. २२६ ) मसूर.

**वनस्पति० रेणुका** ( चसू. ३.५ )

रेणुकबीज ( सुगंधी द्रव्य. )

**हरेणुक**—पु., **वनस्पति० रेणुका** ( असंसू. १६.१२ ) रेणुकबीज ( सुगंधी द्रव्य ).

**( हरेणुका )**—स्त्री., **वनस्पति० रेणुका** ( चसू. ५.२० ) रेणुकबीज. ( सुगंधी द्रव्य )

**हरेण्वाद्यञ्जन**—न., **अञ्जन० हरेण्वादियकृद्रवेण पिष्टमञ्जनं श्लेष्मोपहतदृष्टये नक्तान्धाय हितमित्यर्थः** ( सुउ. १७.२३ )

डोळ्यात घालण्याचे अंजन. वाटाणा इत्यादी यकृताच्या रसात किंवा काढ्यात वाटून, भावना देऊन कफाने झालेल्या दृष्टीच्या विकारात रातआंधळ्यात अंजन करणे हितकर.

**हरोद्भव**—पु., **खनिज० पारदः** ( र. ११.८३ ) पारा.

**हर्ताल**—न., **खनिज० तीक्ष्णलोहप्रकारः** ( ध. ६.२८; पृ. २११ )

पोलादाचा प्रकार.

**हर्म्य**—न., **प्रासादः** ( अहसू. ३.४८ )

गच्चीचा वाडा, हवेली.

**हर्यक्ष**—पु., **पशु० सिंहः, पुत्रे हर्यक्षता सामुद्रिकैः स्तुता** ( चक. चशा. ८.९ )

सिंह. सिंहासारखे डोळे चांगले असे सामुद्रिक म्हणतात.

**हर्ष**—न., **मनोविकार० आनन्दः** ( च. वि. ४.८ )

मनाचा एक विकार, आनंद.

**लक्षण० सिणसिणिका** ( चनि. ५.१० ) **इयं सिणसिणिका वायोरवस्थितत्वेन प्रभावाद्वा क्रियते** ( चसू. २०.१२ )

एक लक्षण. सिणसिणणे. सणकन अंगातून वाताची लहर संचार करणे. वाताच्या चंचलतेने किंवा प्रभावाने हे होते.

**प्रीति०** ( चशा. ४.७ ) **पादहर्षः**

( अहसू. २७.१६ **रोमहर्षः** ) ( सुसू. ४२.९ )

पायात सिणसिणणे, रोमांच उभे रहाणे, केस उभे रहाणे, काटा उभा रहाणे.

**कामः** ( सुशा. २.४५ )
इच्छा, इच्छिलेले. इच्छित, विषयवासना, प्रेम.

**तुष्टिः** ( सुसू. २७.४ ) तृप्ति, संतुष्टता, संतोष.

**नेत्ररोग०** ( सुउ. १.३७ ) द्र० **'नेत्ररोग'**
एक नेत्ररोग.

**वनस्पति० मदनः** (रा. ८.२३१ पृ. ३९ )गेळफळ.

**-योनि**-स्त्री., **हर्षकारणम्** ( चचि. ३०.१३३ )
हर्षाचे कारण, आनंदाचे कारण.

**हर्षण**-वि., **हर्षकरम्** ( चसू. ३०.१५ )
हर्ष करणारे, आनंदकारक.
न., **लक्षण० वेदना० रोम्णामूर्ध्वीभावः, कण्टकितत्वम्** ( हे. अहृसू. १२.५ )
केस उभे रहाणे. रोमांच उभे रहाणे, कांटा उभा रहाणे.

**अन्तःशीतकरः वेदनाविशेषः** ( ड. सुउ. १८.३२)
आतून थंड वाटणे.

**हलदीका**-स्त्री., **वनस्पति० हरिद्रा** (ध. १.५५; पृ.१७ )
हळद.

**हलाहल**-न., **विष० नीलवर्णः** ( र. २९.१६ ) द्र० **'विष'**
निळ्या रंगाचा विषारी कंद.

**हलिनी**-स्त्री., **वनस्पति० कालिकारी** ( ध. ४.९; पृ. १३५ र. २६.४; )
कळलावी.

**उद्भिज्ज० लाङ्गली** (र.१६.१३८) कळलावी.

**हली**-स्त्री., **वनस्पति० कलिकारी** (रा. ४.१७; पृ. १३६)
कळलावी.

**हलीमक**-पु., **रोग० पाण्डुरोगभेदः, यदा कुम्भसाह्वः पाण्डुः हरितः पीतः नीलः स्यात्, तदा तं हलीमकं वदन्ति** ( सुउ. ४४.१२ ) **लक्षणम्-हरितः श्यावपीतकः पाण्डुरोगस्य वर्णः बलोत्साहक्षयस्तन्द्रा मन्दाग्नित्वं मृदुज्वरः स्त्रीष्वहर्षोऽङ्गमर्दः श्वासस्तृष्णाऽरुचिर्भ्रमः इत्येतानि लक्षणानि वातपित्तजानि सन्ति** ( चचि. १६.१३२-३३ ) **तस्य चिकित्सा-वातपित्तहरीं क्रियां कुर्यात्** ( का. प्लीहाहलीमकचि. )
पांडुरोगाचा प्रकार. लक्षण— कुंभकामला नामक पांडुरोग्याचा वर्ण हिरवट, काळसर, पिवळा होतो. तेव्हा त्याला हलीमक म्हणतात. **लक्षणे**— बल, उत्साह, क्षय, झापड, मंदाग्नि, सौम्य ज्वर, कामवासना नष्ट होणे, अंग दुखणे, श्वास-तहान-रुचि नसणे, भ्रम अशी वातपित्तात्मक लक्षणे होतात.
**उपचार**— वातपित्तहारक.

**हविस्**-न., **वनस्पति० शमी** ( रा. ८.१५२; पृ. १८८ )
शमी.

**आहारद्रव्य० घृतम्** ( ध. ६.१४४ पृ. २३६ )
तूप.

**हविष्य**-न., **हविर्योग्यं द्रव्यम्** ( सुशा. २.२५ )
आहुती करता असलेले द्रव्य. हवनाचे द्रव्य.

**हव्य**-न., **देवदेयम्, हवनीयद्रव्यम्** ( इ. असंउ. ४२ )
देवाला देण्याचे- हवनाचे- आहुतीचे द्रव्य.

**हसन**-न., **हास्यम्** ( सुशा. २.२५ )
हसे, हसणे, हास्य.

**हसन्तिका**-स्त्री., **अङ्गारधानिका** ( चसू. १४.५४ )
शेगडी, निखारे असलेली शेगडी.

**हसिर**-पु., **मूषिक० एतद्विषतः अन्नविद्वेषो जृम्भणं रोमहर्षणं च भवति** ( असंउ. ४६ ) द्र० **'मूषिक'**
एक उंदीर. त्याच्या विषाने अन्नाचा तिटकारा, जांभई, रोमांच उभे रहाणे इ० लक्षणे होतात.

**हस्त**-पु., **शारीर० करः, प्रकोष्ठमारभ्याङ्गुल्यन्तो भागः** ( चवि. ८.११७ ) **पञ्चकर्मेन्द्रियेष्वेकम्** ( चशा. ७.७ ) **ग्रहणदानादिकर्मसु नियुक्तम् ( कर्मेन्द्रियम्)** (सुशा. १.४) **चतुर्विंशत्यङ्गुलो हस्तः** (सुसू.३५.१२)
हात. कोपरापासून करांगुळीच्या टोकापर्यंतचा भाग. पाच कर्मेंद्रियांपैकी एक. घेणे, देणे इत्यादी कर्मात नियुक्त असते. २४ अंगुलींचा हात होतो.

**कलापः, पर्णस्य पुष्पपटलस्य वा विस्तृतो भागः** ( चवि. ६.१७ )
पानांचा किंवा फुलांच्या आच्छादनाचा पसरट भाग.

**अनुयन्त्र०** ( अहृसू. २५.४० )
यंत्राच्या ऐवजी वापरावयाचे ते अनुयंत्र.

**नक्षत्र०** ( असंनि. १ ) एक नक्षत्र.

**-स्वेद**-पु., **स्वेद० पाणिस्वेदः** ( कासू., २३.२७ ) द्र० **'स्वेद'**
हाताचा घाम. हाताने शेकणे.

**हस्ताभरण**-पु., **सर्प०मण्डलिभेदः** ( सुक. ४.३४(२) द्र० **'सर्प'**
घणस, घोणस, मंडलीचा प्रकार.

**हस्तिन्**–पु., पशु० ( चसु. १.९४ ) **गुणाः– उष्णं स्वाद्वम्ललवणं विरूक्षणं लेखनं पित्तप्रकोपणं पुष्टिप्रदं दुर्जरं वह्निमान्द्यकरं कफवातघ्नं च**
( ध. ६.३७६ पृ. २०५ ) ( सुसू. ४६.९६ )
हत्ती. मांसाचे गुण–गोड, आंबट, खारट, उष्ण, जडत्व करणारे, रूक्ष करणारे, पौष्टिक, पचवयास जड, दोष खरडून काढणारे, अग्निमांद्य करणारे, कफवातघ्न, पित्तवर्धक.
**वनस्पति० हस्तिकर्णपलाशः** ( र. २८.५८ )
हत्तीच्या कानासारखी मोठी पाने असणारा पळस.

**( हस्तिनी )**–स्त्री., **करिणी** ( सुसू. ४५.५८ ५९ )
हत्तीण.

**(हस्ति)–कक्ष**–पु., **सविषकीट० कणभभेदः**
( सुक. ८.२६-२७)
एक विषारी किडा. कणभाचा प्रकार.

**–कन्द्**–पु., वनस्पति० **गुणाः– कटुरुष्णः कफवातघ्नः त्वग्दोषश्रमकुष्ठविषवीसर्पकफवातामयापहश्च**
( रापरि. ७.३५; पृ. ३५० )
हत्तीकंद. गुण–तिखट, उष्ण, कफवातनाशक, श्रमनाशक, त्वचेचे विकार, कुष्ठ, विष, वीसर्प, कफवातरोग नाशक.

**–करञ्जक**–पु., **वनस्पति० करञ्जभेदः महाकरञ्जः**
( रा. ९.१८२; पृ.१९२ )
करंज प्रकार. मोठा करंज.

**–कर्ण**–पु., **वनस्पति० हस्तिकन्दः**
( रापरि. ७.३५; पृ. ३५० )
हत्तीकंद.
**पलाशः** ( र. २८.६२ ) **महापर्णो भूपलाशः**
( सुसू. ४५.११५ )
मोठ्या पानांचा पळस.
**गजकर्णाकारैकपत्रः** ( सुसू. ३९.९ )
हत्तीच्या कानाच्या आकारासारख्या पानांचा.
**वनस्पति० एरण्डः ( रक्तैरण्डः )**
( ध. १.२९६; पृ. ६७ )
एरंड, तांबडा एरंड.

**( कर्णी )** स्त्री., **वनस्पति० एरण्डः** ( ध. १.२९६; पृ., ६७ )
एरंड.

**–कर्णतैल**–न., **तैल०** ( सुसू. ४५.११५ **द्र० ' कटुतैल '**
कडुतेल. मोठ्या पानांच्या पळसाचे तेल.

**–कारावी**–स्त्री., **वनस्पति० अजमोदा**
( रा. ६.१५० पृ. ९० )
अजमोदा, ओवा.

**–कोशातकी**–स्त्री., **वनस्पति० कोशातकीभेदः द्र० ' कोशातकी '** ( रा. ७.२८४ पृ. ४६ )
दोडकीचा प्रकार.

**–घोषा**–स्त्री., **वनस्पति० कोशातकीभेदः द्र० ' कोशातकी '** ( ध. १९० पृ. ४५ )
दोडकीचा प्रकार.

**–चारिणी**–स्त्री., **वनस्पति० करञ्जभेदः पूतिकरञ्जः**
( ध. ५.१०९; पृ. १९१ )
करंजाचा प्रकार. घाणेरा करंज.

**–दन्त**–न., **वनस्पति० मूलकम्**
( रा. ७.५०; पृ. १४० )
मुळा.

**( –दन्ती )**–स्त्री., **वनस्पति० मृगाक्षी**
( ध. १.२५२; पृ. ५९ )
एक प्रकारचे कवंडळ. एक प्रकारचे कडु इंद्रावण.
**नागदन्ती** ( चसू. १.७७ )
नागदंती, एक वनस्पती.

**–दन्तक**–न., **वनस्पति० मूलकम्**
( ध. ४.३३; पृ. १४० )
मुळा.

**–दन्तफला**–स्त्री., **वनस्पति० उर्वारुकम्**
( ध. १.१७६; पृ. ४१ )
एक काकडी.

**–पत्र**–पु., **वनस्पति० हस्तिकन्दः**
( रापरि. ७.३५; पृ. ३५० )
हत्तीकंद.

**–पर्णिनी**–स्त्री., **वनस्पति० त्रपुसम्**
( ध. १.१७५; पृ. ४१ )
एक काकडी.
**पर्णी**–स्त्री., **वनस्पति० कर्कटी** (रा. ७.२५२ पृ.४१)
एक प्रकारची काकडी.
**मोरटः** ( चसू. १.८२-८४ ) एक मोरवेल.

**–पिप्पली**–स्त्री., **वनस्पति० गजपिप्पली**
(चशा. ८.३४; सुसू. ३८.२२-२३)
गजपिंपळी.

**–मगधा**–स्त्री., वनस्पति० गजपिप्पली (ध. २.७८; पृ. ८५)

गजपिंपळी.

**–मद**–पु., भैषज्य० गजमदः, तद्गुणाः–**तिक्तः स्निग्धः केश्यः अपस्मारनाशनः विषकुष्ठकंडूव्रणादिनुच्च** ( रापरि. ६.२०; पृ. ३४६ )

हत्तीचा मद. गुण— कडु, स्निग्ध, केसांना हितकर, अपस्मार, विष, कुष्ठ, कंडु, व्रणादिनाशक.

**–मयूरिका**–स्त्री., वनस्पति० अजमोदा (ध. २.९८; पृ. ८९)

ओवा, अजमोदा.

**–मशक**–पु., कीट० **मशकभेदः तेन दष्टस्य कण्डूर्दंशः शोफश्च, नखावकृष्टेऽत्यर्थं पिडका दाहपाका भवन्ति** ( सुक. ८.३६-३७ )

डासाचा प्रकार. तो डसला तर खाज, दंशाच्या जागेवर सूज, नखाने खाजवले तर फार पुळ्या होऊन दाह होतो व सूज पिकते.

**–मूत्र**–न., **गजस्य मूत्रम्** ( चसू. १.९४ ) **तद्गुणाः– तिक्तं लवणं भेदि वातघ्नं पित्तकोपनं तीक्ष्णं क्षारोपयोगि किलासघ्नं च** ( सुसू. ४५.२२६ )

हत्तीचे मूत्र. गुण— कडु, खारट, भेदक, वातनाशक तीक्ष्ण, क्षाराच्या उपयोगी, कोडनाशक, पित्त वाढविणारे.

**–मेदस्**–न., गजभेदः, **शाखादमेदसामहिततमम्** ( चसू. २५.३९ )

हत्तीची चरबी. झाडाचा पालापाचोळा, डहाळ्या खाणाऱ्या प्राण्यांच्या मेदापेक्षा अतिशय अहितकर.

**–मेह**–पु., रोग० **प्रमेहभेदः वातजोऽयम्, सलसीकं मधुरमवेगं लसीकयैव च विबद्धमनुबद्धमजस्रं मत्तहस्तीव च मेहति** ( असंनि. १०.२८; चसू. १९.४-(९) ) द्र० 'प्रमेह'

प्रमेहाचा प्रकार. हा वातज. लसीकेसह गोड, लसीकेप्रमाणे वेग नसलेली, थांबून थांबून, मत्त हत्तीप्रमाणे लघ्वी करतो.

**–रोध्रक**–पु., वनस्पति० लोध्रः ( रा. ६.२३८; पृ. १२९ )

रोध्र.

**–रोहणक**–पु., वनस्पति० **करञ्जभेदः, पूतिकरञ्जः** ( ध. ५.१०९; पृ. १९१ )

करंजाचा प्रकार; घाणेरा करंज.

**–विष**–न., खनिज० **कङ्कुष्ठम्** ( र. २९.९०-९२ )

कंकुष्ठ.

**–विषाणिका**–स्त्री., वनस्पति० कदली ( ध. ४.७५; पृ. १४८ )

केळ.

**–शुण्डिका**–स्त्री., **गजशुंडा हस्तिहस्तः** (सुचि. ३२.७)

हत्तीची सोंड, हत्तीचा हात.

**–शुण्डी**–स्त्री., वनस्पति० गुणाः– **कटूष्णा सन्निपातज्वरापहा च** ( रापरि. ५.२०; पृ. ३४१ )

घुरकट पानांची वनस्पती **गुण**—तिखट, उष्ण, सन्निपात ज्वरनाशक.

**–श्यामाक**–पु., तृणधान्य० **श्यामाकभेदः कषायमधुरलघुवातलशीतसंग्राह्यादिगुणः** ( चसू. २७.१७; ड. सुसू. ४६.२१ )

साव्याचा प्रकार. भगर, एक प्रकार. **गुण**— तुरट, गोड, हलका, वातुळ थंड, मळ बांधणे इत्यादी.

**–हस्त**–पु., **हस्तिशुण्डिका** ( सुचि. ३२.७ )

हत्तीची सोंड.

**हस्तिनी**–स्त्री., पशु० **करिणी** ( सुसू. ४६.५८-५९ )

हत्तीची मादी. हत्तीण.

**–क्षीर**–न., **हस्तिन्याः क्षीरम्**, गुणाः– **रसेन मधुरं, कषायानुरसं शीतं गुरु स्निग्धं स्थैर्यकरं चक्षुष्यं वृष्यं बल्यं च** (चसू. २७.२२३; सुसू. ४५.५८-५९)

हत्तीणीचे दूध. **गुण**—रसाने गोड, मागाहून थोडे तुरट, थंड, जड, स्निग्ध, धातूंना स्थिर करणारे; डोळे, शुक्र, व बल यांना हितकर.

**–घृत**–न., घृत० **हस्तिन्याः घृतम्, गुणाः–कषायं तिक्तं बद्धविण्मूत्रम् अग्निकरं लघु कफकुष्ठविषक्रिमिहरम्** ( सुसू. ४५.१०४ )

हत्तीणीचे तूप. गुण–तुरट कडु, मळमूत्राचा अवरोध करणारे, अग्निवर्धक, हलके, कफ, कुष्ठ, विष, कृमि हारक.

**–दधि**–न., **करिणीदधिगुणाः–कषायानुरसम् उष्णं पाके लघु, बलासघ्नं पक्तिनाशनं वर्चोविवर्धनं च** ( सुसू. ४५.७४; ध. ६.१९७; पृ. २४५ )

हत्तिणीचे दही. मागाहून तुरट स्वाद, उष्ण, पचनानंतर हलके कफनाशक, अग्नि मंदकारक व मळ वाढविणारे.

**हस्त्यस्थिक्षार**–पु., हस्त्यस्थ्नः क्षारः, हस्तिमेहे पानार्थमुपयुज्यते ( सुचि. ११.९ )
हत्तीच्या हाडांचा क्षार, भस्म हस्तिमेहात पिण्याकरिता उपयोगी.

**हस्त्यालुक**–न., कन्द० महाकाष्ठालुकम् (सुसू. ४६.२९८)
मोठा कंद.

**हांस**–वि., हंसस्येदम् ( चसू. १३.८३ )
हंसाचे ( पीस, इ० )

**हाटक**–न., खनिज० सुवर्णम् ( र. २६.५१ ) सोने.
**मान० कर्षमानम्** ( र. २०.९० ) वजन, तोळा.

**हानव्यदन्त**–पु., दन्त० हनुमूले स्थितः, राजदन्ततः षष्ठः सप्तमोऽ अष्टमश्च हानव्यः ( कासू. २०.४ )
हनुवटीच्या मुळापाशी असलेला. ( दात )
राजदंतापासून सहावा सातवा आणि आठवा ( दांत ) हे हानव्यदंत.

**हायन**–पु., शूकधान्य० ( चसू. २७.१२ ) द्र० 'शालि'
साळीचा प्रकार.

**हायनक**–पु., धान्य० शालिभेदः ( चनि. ४.५ )
साळीचा प्रकार.

**हार**–पु., मुक्तावलिः ( चवि. ६.१७; अहसू. १३.५-१७ )
मोत्यांची माळ.

**–यष्टि**–स्त्री., मौक्तिकमाला ( सुउ. ४७.६४ )
मोत्यांची माळ.

**–हूरा**– स्त्री., वनपति० उत्तरापथिकाद्राक्षा ( रा. ११.७७; पृ. १८० )
उत्तरेकडील द्राक्ष.

**हारिद्र**–पु., शाक० सर्पच्छत्रानुकारी पीताभासः ( अरु. अहसू. ७.४१ )
नागाच्या फणेसारखी व पिवळी भासणारी वनस्पती–भाजी
**वनस्पति० पलाण्डुः** ( रा. ७.१०१; पृ. १४८ )
कांदा.

**–त्व**–न., वर्ण० पीतत्वम् ( चसू. २०.१४ )
पिवळेपणा.

**–नेत्र**–न., लक्षण० नेत्रस्य पीतवर्णत्वम् ( चसू. २०.१४ )
डोळ्याचा पिवळेपणा.

**–मूत्र**–न., लक्षण० मूत्रस्य पीतवर्णत्वम् ( चसू. २०.१४ )
मूत्राचा पिवळेपणा.

**–मेह**–पु., रोग० प्रमेहभेदः । तल्लक्षणम्–पित्तजोऽयम् कटुकं सदाहं हरिद्राभं मेहति । हारिद्रमेही ( असंनि. १०.२३ )
प्रमेहाचा प्रकार, पित्तज मेह; लक्षण–तिखट, आगयुक्त हळदीसारखी लघ्वी होते.

**–वर्चस्त्व**–न., लक्षण० पुरीषस्य पीतत्वम् हारिद्रपुरीषता ( चसू. २०.१४ )
पिवळा मळ असणे, मळाचा पिवळेपणा.

**–वह्नि**–पु., दारुहरिद्राकाष्ठाग्निः ( अहसू. ७.४४ )
दारुहळदीच्या लाकडाचा अग्नी.

**–शूलक**–न., दारुहरिद्राकाष्ठकृतं शूलम् ( मांसभर्जनपचनसाधनम् ) ( अहसू. ७.४४ )
दारुहळदीच्या काडीचे केलेले मांस भाजण्याचे साधन.

**–सीसक**–पु., हरिद्राकाष्ठकृतं भटित्रकरणकाष्ठम् ( चसू. २६.८४ )
मांस भाजण्यासाठी दारुहळदीच्या लाकडाची केलेली सळई.

**हारिद्रक**–पु., पक्षि० हरिताल (चसू. २६.८४) हरताळ.
**सन्निपातज्वर० तल्लक्षणानि–देहनखनेत्रकरांघ्रितापहारिद्रत्वम् । तथा ष्ठीवनं कासश्च; असौ ज्वरः असाध्यः** ( मा. ज्वर. २४ )
त्रिदोषज ज्वर; दोषी ज्वर. लक्षणे–शरीर, डोळे, नखे, तळहात, पाय यांची आग व पिवळेपणा. तसेच थुंकी, खोकला. हा ज्वर असाध्य.
**विष० पीतवर्णमिदं विषम्** ( र. २९.१८ )
एक विष. पिवळ्या रंगाचे हे असते.

**–मांस**–न., हरिताल इति ख्यातस्य पक्षिणः मांसम् ( चसू. २६.८४ )
हरिताल या नावाच्या पक्ष्याचे मांस.

**हारीत**–पु., पुनर्वसोरात्रेयस्य शिष्यः, असौ तन्त्रकर्ता ( चसू. १.३१ )
पुनर्वसु आत्रेय मुनींचा हा शिष्य. याने हारीतसंहिता म्हणून एक ग्रंथ केला आहे.
**पक्षि० हरितालः** ( सुसू. ४६.६७ ) हरिताळ पक्षी.

**हार्य**–वि., वनस्पति० विभीतकः ( ध. १.२१२; पृ. ५० )
बेहेडा.

**हाला**–स्त्री., आसुत० मद्यम् ( ध. ६.२५६; पृ. २५१ )
मद्य.

**हालाहल**–न., विषम् ( र. २.१२९ ) कन्दविष० अनेन श्यावत्वं चिरेणोच्छ्वासश्च भवति ( असंउ. ४० ) इ०
एक तीव्र विष. विषारी कांदा. याने काळेपणा व अधिक वेळाने उच्छ्वास करणे ही चिन्हे होतात.

**हाव**–पु., स्त्रीणां शृङ्गारचेष्टा ( चक्र. चचि. २.१(९) )
स्त्रियांच्या शृंगारिक चेष्टा, हावभाव.

**हास**–पु., वनस्पति० शालिः ( ध. ६.७०; पृ. २१९ )
साळ, तांदूळ.

**हास्तिक**–वि., हस्तिन इदम् ( चसू. १.१०२-१०३ )
हत्तीचे (दात, मळ, मूत्र इ.)

**हास्यफल**–पु., वनस्पति० विकण्टकः ( रापरि. ११.२०; पृ. ३७४ )
मऊ, गाठाळ व ढग येण्याच्या वेळी–मृगाचे वेळी येणाऱ्या फळांची वनस्पती.

**हाहा**–(अव्य.) हाहाकारः ( असंशा. १२.१२ )
हाहाकार. कल्लोळ.

**हिंसा**–स्त्री., वधः ( सुउ. ६०.५ )
वध, हिंसा, ठार मारणे.

**–विहार**–पु., वधक्रीडनम् ( ड. सुउ. ६०.२६ )
हिंसारूपी खेळ. ठार मारण्याचा खेळ.

**हिंसार्थिन्**–वि., मारात्मकः जिघांसुः ( चचि. ९.२२ )
हिंसा करू इच्छिणारा, जीव घेऊ इच्छिणारा. मारेकरी.

**हिंस्रा**–स्त्री., वनस्पति० जटामांसी ( चचि. ३०.६२; सुउ. ५१.१८ )
जटामांसी.

**हिंस्रादिघृत**–न., घृत० श्वासकासारोचकादिव्याधिसमूहहन्तृ ( सुउ. ५१.१८-२० )
जटामांसी इ० द्रव्यांचे सिद्धघृत, श्वास, खोकला, अरुचि इ० व्याधिनाशक.

**हिंस्रादितैल**–न., सिद्धतैल० तत् वातव्रणनाडी सुसंशोधनपूरणरोपणार्थं चोपयुज्यते ( सुचि. १७.१९-२० )
जटामांसी इ० औषधाचे सिद्धतेल. वातजव्रण नाडीव्रण यांचे शोधन, पूरण व रोपण होण्यासाठी उपयुक्त.

**हिक्का**–स्त्री., रोग० हिगिति कृत्वा कायति शब्दायते इति हिक्का इति शाब्दिकाः ( ड. सुउ. ५०.६ ) **तत्स्वरूपम्—सस्वनो वायुः यकृत्प्लीहांत्राणि** आक्षिपन् इव मुखादुदेति स घोषवान् वायुरसून् हिनस्ति, ततः हिक्केति नाम ( सुउ. ५०.६ ) **संप्राप्तिः-उरःस्थो मारुतः प्राणवाहीनि स्रोतांस्याविश्य कुप्यति, कफमुध्दूय हिक्कां करोति** ( चचि. १७.१७ ) **भेदाः—अन्नजा, यमला, क्षुद्रा, गम्भीरा,** महतीति पञ्च हिक्काः ( सुउ. ५०.७ ) **पञ्चसु हिक्कास्वन्नजा क्षुद्रजेति हिक्काद्वयं साध्यम्, महाहिक्का गम्भीरा चासाध्ये । सर्वलक्षणसमन्विता यमला असाध्या । तथैव चिरकालसंचितामस्य स्थविरस्य व्यवायिनः व्याधिभिः क्षीणदेहस्य भक्तच्छेदक्षतस्य च हिक्काः असाध्या भवन्ति । हिक्का मृत्युकाले कृतालापा शीघ्रकारिणी नाशाय** भवति ( अहनि. ४.३०-३१ ) **सामान्यपूर्वरूपाणि कण्ठोरसोर्गुरुत्वं वदनस्य कषायता कुक्षेराटोपश्च** ( चचि. १७.१९ ) **अरतिः** ( सुउ. ५०.८ ) **सामान्यचिकित्सा—प्राणायामः उद्वेजनं त्रासनं सूचितोदैः संभ्रम इत्युपायाः हिक्कायां शस्ता** ( सुउ. ५०.१६ )

**उचकी**—हिक् असा शब्द करते ती हिक्का. **स्वरूप**—वायु आवाज करीत यकृत प्लीहा आंत्र यांना वर फेकल्यासारखे करून तोंडातून बाहेर पडतो. हा आवाज करणारा वायु जीव घेतो, त्रास देतो. **संप्राप्ति**—छातीतील वायु प्राणवह स्रोतसात शिरून प्रकुपित होतो व कफाला वर फेकून हिक्का करतो. **प्रकार**—(१) अन्नजा (अन्नापासून होणारी) (२) यमला–जोडीच्या वेगाने येणारी. (३) क्षुद्रा–त्रासदायक नसलेली ( सौम्य ) (४) गंभीरा ( खोल दोषदुष्टि असलेली ) व (५) तिच्यापेक्षा मोठी. अशा पाच प्रकारच्या उचकी असतात. **साध्यासाध्यत्व**—अन्नजा व क्षुद्रा या दोन्ही साध्य, गंभीरा व महाहिक्का ह्या असाध्य व यमला सर्वलक्षणांनी युक्त असेल तर असाध्य. तसेच रोगाने झालेली जेवण न घेतल्यामुळे अशक्त झालेल्याची, दीर्घ काळ चालू असलेली, म्हाताऱ्याची, अति संभोग करणाऱ्याची उचकी असाध्य असते.

मृत्यूच्या वेळी आली तर त्वरित मारक होते. सामान्य पूर्वरूपे–घसा व छाती जड होणे, तोंड तुरट, कुशी फुगणे, गुडगुडशब्द व बेचैनी, सामान्य उपचार–प्राण-वायु रोकणे, प्राणायाम करणे, उद्वेग येईल असे करणे, सुया टोचून त्रास देणे व त्याचे मन व्याकुळ करणे.

**–कर**–वि., **हिक्कां करोतीति, हिक्काजनकः ( रोगः )** ( चइ. १०.६ )
उचकी करणारे उचकीजनक ( रोग ).

**–नाशक**–पु., पारदादियोग॰ **पारदगन्धकधान्याभ्रकहरितालमाक्षिका एकैकभागवृध्द्या वचाकुष्ठहरिद्रायवक्षारचित्रकपाठालाङ्गलीत्रिकटुसैन्धवबिभीतकवत्सनाभाश्च एकैकभागा भृङ्गराजरसेन मर्दयितव्याः अयं हिक्कावैस्वर्यकासान्नाशयति** ( र. १३.७१ )
उचकीनाशक पाऱ्याचा योग. पारा, गंधक; धान्याभ्रक, हरताळ, सुवर्णमाक्षिक. एकेक भाग वाढता घेऊन वेखंड, कोष्ठ, हळद, जवखार, चित्रक, पहाडमूळ, कळलावी, सुंठ, मिरी, पिंपळी, सैंधव, बेहेडा, बचनाग एकेक भाग घेऊन माक्याच्या रसाने खल करावा. हा योग उचकी, आवाज फुटणे, खोकलानाशक.

**–निग्रहण**–वि., **हिक्कानाशकम्. तानि च द्रव्याणि शटीपुष्करमूलबदरबीजकण्टकारिकाबृहतीवृक्षरुहाभयापिप्पलीदुरालभाकुलीरशृङ्ग्य इति दशेमानि हिक्कानिग्रहाणि भवन्ति** ( चसू. ४.१४ )
उचकीहारक गुण–कचोरा, पुष्करमूळ, बोराचे बी, रिंगणी, डोरली, गुळवेल, हिरडा, पिंपळी, धमासा, काकडशिंगी ही उचकी नाशक होत.

**–प्रतिषेध**–पु., **अध्यायसंज्ञा॰** ( सुउ. ५०.१ )
अध्यायाचे नाव. यात उचकीचे उपाय आहेत.

**–श्वासचिकित्सित**–न., **अध्यायसंज्ञा॰** ( चचि. १७.१ )
अध्यायाचे नाव. यात उचकी व श्वास यांचे उपचार आहेत.

**–स्थान**–न., **कण्ठस्तनान्तरम्** ( सुउ. ५०.१९ )
घसा व स्तनांचा मध्यभाग. उचकीचे स्थान.

**हिक्किका**–स्त्री., **हिक्का** ( र. २.१७५ ) उचकी.

**हिङ्गु**–न., **निर्यास॰ संज्ञास्थापनगणे, श्वासहरगणे, प्रोक्तमेकं द्रव्यम्** ( चसू. ४.१६-१८ ) **गुणाः–कटु उष्णं हृद्यं सरं चक्षुष्यं वातकफघ्नं बन्धशूलकृमिगुल्महृद्रोगोदराध्माननाशकं च** ( ध. २.३६; पृ. ७७ ) **भेदिनीयवाग्वामुपयुक्तम्** ( चसू. २.२९ ) **शिरोविरेचनकरम्** ( सुसू. ३९.६ )
हिं.—हींग.
**म.—हिंग.**
गु.—वघारणी.
बं.—हिंगु.
हिंग, झाडाचा डिंक, संज्ञा आणणाऱ्या गणातील, श्वासहर गणातील एक औषध. गुण–तिखट, उष्ण, सारक, हृदय, डोळे यांना हितकर, वातकफघ्न, अवरोध, शूळ, कृमि, गुल्म, हृद्रोग, उदर पोटफुगी नाशक. मळ फोडणाऱ्या पेजेमध्ये उपयुक्त. नाकात घालून डोक्याला रेचक म्हणून उपयुक्त.
**संज्ञास्थापनगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१८ ) **श्वासहरगणे एकं द्रव्यम्** ( चसू. ४.१६ ) **शिरोविरेचनार्थमुपयुज्यते** ( सुसू. ३९.६ )
संज्ञास्थापन, श्वासहर आणि शिरोविरेचन गणातील एक द्रव्य.

**–जटा**–स्त्री., **वनस्पति॰ हिङ्गुपत्री** ( इन्दु. असंउ. ९ )
बाफळी.

**–नाडिका**–स्त्री., **निर्यास॰ हिङ्गु** ( रा. ६.६४; पृ. ७८ )
हिंग.

**–निर्यास**–पु., **भैषज्य॰ छेदनीयदीपनीयानुलोमिकवातकफप्रशमनानां श्रेष्ठः** ( चसू. २५.४० )
हिंग. स्रोतसांतील अडथळा दूर करून कफनाश करणाऱ्या द्रव्यात श्रेष्ठ, तसेच अग्निदीपक, मळ वात सरविणाऱ्या वातकफनाशक औषधात श्रेष्ठ.
**वनस्पति॰ किराततिक्तः** ( ध. १.३४; पृ. १४ )
काडेचिराईत.
**निम्बः** ( रा. ९.४४; पृ. १३ ) निंब.

**–पत्र**–पु., **वनस्पति॰ इङ्गुदी** ( रापरि. ८.१७; पृ. ३५८ )
हिंगणबेट.

( **–पत्री** )–स्त्री., **वनस्पति॰ गुणाः–कटुस्तिक्ता उष्णा तीक्ष्णा हृद्यारुच्यापथ्यादीपनपाचनकरी वातकफघ्नी कृमिप्लीहाविबन्धार्शोगुल्मबस्तिशूलहृद्रोगामहरा च** ( ध. २.३८; पृ. ७७ )
बाफळी–गुण— तिखट, कडु, उष्ण, तीक्ष्ण, हृदयास हितकर, रुचकर, पथ्याला हितकर, दीपक, पाचक, वातकफनाशक. कृमि, प्लीहा, अवरोध, मूळव्याध, गुल्म, बस्ति, शूल, हृद्रोग, आमहर.

**–पर्णी**–स्त्री., **वनस्पति॰ वंशपत्रिका** ( चक्र. ) **उन्मादचिकित्सायामुपयुक्तमेकं द्रव्यम्** ( चचि. ९.५७ )
बाफळी. उन्माद उपचारात उपयुक्त द्रव्य.

**-शिवाटिका**-स्त्री., वनस्पति० वंशपत्रिका (च. चचि. १०. ३७)

बाफळी.

हिङ्गुपत्री (इ. असंउ. १०) बाफळी.

**हिङ्गुल**-न., खनिज० **हिङ्गुलो द्विविधः, एकः शुकतुण्डः अपरो हंसपाकश्च । शुकतुण्डः पीतो, हंसपाकः श्वेतरेखः** (र. ३.१५५) **हिङ्गुलाहृतसूतो गन्धजारितपारदतुल्यगुणो भवति** (र. ३.१५८) **शृङ्गवेररसेन लकुचस्य स्वरसेन वा सप्तवारं भावयित्वा शोषितो हिङ्गुलः शुद्धो भवति** (र. ३.१५९) **मेष्याः क्षीरेणाम्लवर्गैश्च सुभावितो हिङ्गुलः साक्षात् वरकुङ्कुमप्रभं सम्पद्यते** (र. ३.१६०) **हिङ्गुलो जलसहिते पातनायन्त्रे पातितः स्यात्तर्हि तत्सत्त्वं सूतसङ्काशं जायते** (र. ३.१६१) **गुणाः- मधुरो तिक्तः कटुरुष्णः दीपनरसायनकरः सर्वदोषघ्नः सर्वरोगहरः पुष्टिकरो वृष्यश्च** (र. ३.१५७)

**हिंगूळ**—एक खनिज द्रव्य. प्रकार २ त्यातील शुकतुंड पिवळसर असतो. व हंसपाक पांढऱ्या रेषांचा असतो. हिंगुळातून काढलेला पारा गंधक जीर्ण पाऱ्याचा गुणाचा असतो. सुंठ किंवा ओटी फळाच्या रसाच्या सात भावना देऊन सुकविला की हिंगूळ शुद्ध होतो. मेंढीच्या दुधाने किंवा लिंबू वगैरे आंबट वर्गाच्या भावनांनी हिंगूळ उत्तम केशराच्या रंगाप्रमाणे होतो. हिंगुळ पाणी युक्त डमरूयंत्राने उडवून घेतला की त्याचे सत्व पाऱ्यासारखे होते—पारा होतो. गुण—गोड, कडु, तिखट, उष्ण, अग्निदीपक, धातूंचा परिपोषण क्रम सुधारणारा सर्व दोषघ्न. सर्व रोगनाशक, पौष्टिक व शुक्र वाढविणारा आहे.

**हिङ्गुलाकृष्ट**-वि., **हिङ्गुलादार्द्रकस्वरसमर्दनानन्तरं विद्याधराख्ययन्त्रादाकृष्टः (पारदः)** (र. ८.३७)

हिंगुळातून काढलेला (पारा). हिंगुळाला आल्याच्या रसाच्या भावना देऊन सुकविल्यानंतर विद्याधरयंत्राने उडविलेला (पारा).

**हिङ्गुलाकृष्टिविद्याधरयन्त्र**-न., यन्त्र० **अन्तस्तले निहितशुष्कहिङ्गुलाया विशालमुखाया स्थालिकाया उपरि उत्तानामेव लघुस्थालीं स्थापयित्वा संधिलेपादिना रुध्द्वा ऊर्ध्वस्थाल्यां किञ्चिच्छीतजलं पुनः पुनर्दद्यात् । अधःचुल्यां वह्निं ज्वालयेत् प्रहरत्रयपर्यन्तम् । एतद्यन्त्रं पारदस्य हिङ्गुलाद्वियुज्योर्ध्वपात्रतले आकृष्टिकरं स्यात्** (र. ९.५६-५७)

**हिंगुळातून पारा काढण्याचे विद्याधरयंत्र**—मोठ्या तोंडाच्या मडक्याच्या थाळीत तळात सुकलेला. हिंगूळ ठेवून थाली एक लहान थाळी तशीच वर तोंड करून ठेवून संधिलेप करून वरच्या थाळीत थंड पाणी थोडेथोडे पुन्हा पुन्हा टाकावे. खाली जाळ लावावा, तीन प्रहरात हिंगुळातून सर्व पारा अलग होऊन वरच्या भांड्याच्या तळाशी लागेल.

**हिङ्गुलूक**-पु., खनिज० **हिङ्गुलः** (र. १३.९-१२) हिंगूळ.

**हिङ्गूल**—न., खनिज० **हिङ्गुलः** (ध. ६.४०) हिंगूळ.

**हिङ्गुलेश्वर**-पु., **वृद्धज्वराङ्कुशः** (र. १२.४२)

हिंगुलेश्वर नावाचे सिद्ध रसायन. ज्वरनाशक—दुसरे नाव वृद्ध ज्वरांकुश. पारा, हिंगुळ, जेपाळ हे प्रमुख घटक यात आहेत.

**हिङ्ग्वादि चूर्ण**-न., **हिङ्गु त्रिकटुकपाठाहपुषाऽभयाशठीतिन्तिडीकाऽम्लवेतसाऽजमोदाऽजगन्धादाडिमपुष्करचित्रकादीनां चूर्णमेतत् । पार्श्वहृद्बस्तिशूलवातकफात्मकगुल्माऽनाहमूत्रकृच्छ्रगुदयोनिजशूलग्रहण्यर्शोविकारपाण्डुामयाऽरुचिहिक्काकासश्वासगलग्रहनाशनम्** (चचि. ५.७९-८३)

**हिङ्ग्वादिचूर्ण**-हिंग, सुंठ, मिरे, पिंपळी, पहाडमूळ खडशेरणी, हिरडा, कचोरा, चिंच, अम्लवेतस, अजमोदा, अजवला, डाळिंब. चित्रक वगैरे औषधांचे चूर्ण. हे बरगड्या व बस्तीमधील शूल, वातकफात्मक गुल्म, मलबद्धतायुक्त पोटफुगी, मूत्रकृच्छ्र, गुद आणि योनिशूल, ग्रहणी, मूळव्याध, पांडुरोग, अरुचि, उचकी, खोकला, श्वास व गलग्रह यांचे नाशक आहे.

**हिज्जुल**-पु., **वनस्पति निचुलः** (रापरि. ८.७०; पृ. ३६३)

जलवेतसाची एक जात.

**हित**-पु., **वनस्पति० यावनालः** (रा. १६.१७१; पृ. २२९) जोंधळा.

न., **भेषजम् औषधम्** (चचि. १.३(१); औषध. (चसू. २५.३३)

**-चर्या**-स्त्री., **हितकरं वर्तनम्** (अहसू. ११.४५)

हिताची वागणूक, हितकारक वर्तन.

**-विहार**-पु., **हितकरो विहारः** (अहसू. २७.५१)

हितकारक विहार; हितकारक कामे—कर्म.

**हितल**–वनस्पति० यावनालः ( रा. १६.१७१; पृ. २२९ )
जोंधळा.

**हिताहार**–पु., योग्याहारः ( अहृसू. २७.५१ ) यदा हारजातं समश्चैव शरीरधातून् प्रकृतौ स्थापयति विषमांश्च समीकरोति तत् हितमाहारजातम् ( चसू. २५.२३ )
हितकारक आहार, हितकर अन्न. शरीर धातूंना समानस्थितीतच ठेवणारे आणि विषमांनाही सम स्थितीत आणणारे जे आहार द्रव्य ते हिताहार होय.

**हिताहितीय**–वि., अध्यायसंज्ञा० हिताहितद्रव्याण्यधिकृत्य कृतः ( सुसू. २०.१ )
अध्यायाचे नाव. यात हितकर व अहितकर आहार इत्यादी दिले आहेत.

**हिध्मा**–स्त्री., रोग० हिक्का ( असंनि. ४.२९ ) ( अहृनि. ४.२९-३१ ) उचकी.

**हिन्ताल**–पु., वनस्पति० तालः ( रा. ९.९७; चक. १.८; पृ. १८२ )
ताड.

**हिम**–वि., गुण० शीतः, तस्य स्तम्भने शक्तिः ( अहृसू. १.१८ )
थंड. ( गुण ). स्तंभन करण्याची शक्ति या गुणात आहे.
**आगन्तुशोथोत्पत्तेरेकं कारणम्** ( चसू. १८.४ )
शीतद्रव्याचा अतियोग हे आंगतु सुजेच्या रोगाचे कारण आहे.
**निर्यास० कर्पूरः** ( ध. ३.३१; अहृसू. ३.१; पृ. १०१ )
कापूर.
न., वनस्पति० पद्मकम् ( ध. ३.१४९; पृ. ११३ )
कमळ.
**रत्न० मौक्तिकम्** ( रा. १३.६७; पृ. २१८ ) मोती.
**खनिज० वङ्गम्** ( रा. १३.१४; पृ. २०८ ) कथील.
**वनस्पति० चन्दनम्** ( रा. १२.१०; सुउ. ४२.७१; पृ. ९४ )
चंदन.
**वनस्पति० वालकम्** ( र. १७.४३-४५ ) वाळा.
वि., शीतवीर्यम् ( र. ३.१०९ )
शीत वीर्य, थंड वीर्याचे.

**( हिमा )**–स्त्री., वनस्पति० द्राक्षाभेदः द्र० 'द्राक्षा' ( रा. ११.७७; पृ. १८० )
द्राक्षांचा प्रकार.



**मेदा** ( रा. ५.१६०; पृ. ३१ )
मेदा. अष्टवर्गापैकी एक.
**रेणुका** ( रा. ६.९९; पृ. १०६ )
रेणुकबीज ( एक सुगंधी द्रव्य. )
**मुस्ता** ( रा. ६.५९; पृ. १५ ) नागरमोथा.
**चणिका** ( रापरि. ८.६५; पृ. २६२ )
दूधाळ–दुधासारख्या रसाची वनस्पती.
**सूक्ष्मैला** ( रा. ६.६८; पृ. ७८ )
लहान वेलदोडा, वेलची.

**–कर**–पु., निर्यास० कर्पूरः (रा. १२.५६; पृ. १०१)
कापूर.

**–जलपान**–न., शीतजलपानं, तच्च तृष्णासु शर्मकरं भवति ( चचि. २२.२२ ) द्र० 'जल'
थंड पाणी पिणे. ते तहानेमध्ये सुखकर होते.

**–जा**–स्त्री., वनस्पति० काञ्चनक्षीरी ( रा. ५.३६३; पृ. ५७ )
पिवळा धोतरा, पिसोळा.

**–त्रय**–न, चन्दनत्रयम् मलयजरक्तचन्दन—दारुहरिद्रा भेदेन त्रिविधम् ( अरु. अहृसू. १५.१९ )
चंदन त्रयी. पांढरा चंदन, रक्त चंदन व दारुहळद अशी त्रयी.

**–दुग्धा**–स्त्री., वनस्पति० काञ्चनक्षीरी ( रा. ५.३६२; पृ. ५७ )
पिवळा धोत्रा, पिसोळा.

**–द्रुम**–पु., वनस्पति० महानिम्बः (रा. ९.४६; पृ. १३)
मोठा निंब.

**–भूभृत्**–पु., हिमालयपर्वतः ( र. २.११२-१३ )
हिमालय पर्वत.
**असौ औषधिभूमीनां श्रेष्ठः** ( चसू. २५.४०; सुचि. २९.२७ )
हा औषधिभूमीत श्रेष्ठ.

**–वत्**–पु., हिमालयपर्वतः ( सुचि. २९.२७ )
हिमालय पर्वत.

**–वालुक**–पु., निर्यास० कर्पूरः (ध. ३.३१; पृ. १०१)
कापूर.

**–शर्करा**–स्त्री., आहारद्रव्य० शर्कराभेदः मधुरातिक्तोष्णाऽतिपिच्छिलसारिकारुच्यावातघ्नीदाहपित्तास्रदायिनी च (रा. १४.१६३; पृ. ९१)

साखरेचा प्रकार. गोड, कडु, उष्ण, अति बुळबुळीत रुचकर. सारक, वातनाशक, दाह, रक्तपित्त कारक.

**-संक्षय**-पु., ऋतु० वसन्तर्तुः ( सुचि. ३०.३१ ) ) वसंतऋतु.

**-संज्ञितकषाय**-पु., कषाय० शीतकषायः ( सुउ. ४९.२४ )
कषायाचा एक प्रकार. हिम.

**-साह्वय**-पु., ऋतु० हेमन्तः ( सुसू. ६.२३ ) हेमन्त ऋतु.

**-स्पर्श**-वि., शीतस्पर्शः ( अहृसू. १०.१० ) स्पर्शाला थंड लागणारे.

**हिमांशु**-पु., पारदयोग० **पारदं कर्षमात्रं रक्तागस्त्यपुष्पस्वरसेन सप्तवारं मर्दयेत् । तथा च श्वेतदूर्वारसेन ततश्च टङ्कणं निष्कद्वयं खदिरसारं कर्पूरं च प्रत्येकं कर्षं तत्र प्रक्षिप्य चन्दनक्वाथेन मर्दयेत् । कलायमात्रा वटकाः कुर्यात् । मात्रा-एकैको वटकः । समयः-प्रातर्मध्याह्ने रात्रौ च । असौ मेहमुखशोषसोमरोगपिटिकादाहतृष्णानाशकः** ( र. १७.१२२-२७ )
एक पाऱ्याचा योग. पारा एक तोळा तांबड्या हदग्याच्या फुलाच्या रसाने व पांढऱ्या दूर्वेच्या रसाने सात सात वेळा मर्दन करावा. नंतर टाकणखार दोन तोळे, काथ (खैराचा), कापूर प्रत्येकी तोळा त्यात टाकून चंदनाच्या काढ्याने मर्दन करावा. वाटाण्याएवढ्या गोळ्या कराव्या. मात्रा एकेक गोळी. सकाळी माध्यान्ही व रात्री द्यावी ही तोंडाचा शोष, सोमरोग, पुळ्या, दाह, तहान नाशक.

**हिमाद्रिजा**-स्त्री., वनस्पति० **काञ्चनक्षीरी** ( रा. ५.३६३; पृ. ५७ )
पिवळा धोत्रा, पिसोळा.

**हिमागम**-पु., ऋतु० **हेमन्तर्तुः शीतकालः** ( चसि. ६.४; अहृसू. १३.३४ )
थंड ऋतु, हेमंत ऋतु. हिवाळा.

**हिमानद्ध**-वि., **हिमसंबद्धः**, ( डल्हणः ) ( सुसू. ६.२२) थंडीशी संबद्ध. थंडीने व्यापलेला, थंड झालेला.

**हिमानी**-स्त्री., आहारद्रव्य० **शर्कराभेदः हिमशर्करा** ( रा. १४.१६३; पृ. ९१ )
थंड साखर.

**हिमालया**-स्त्री., वनस्पति० **भूधात्री** ( रा. ५.१४५; पृ. ११३ )
भुई आवळी.

**हिमाश्रया**-स्त्री., वनस्पति० **हेमा** ( रापरि. ३.१३; पृ. ३३१ )
पिवळी फुले व पाने असलेली. पिवळी वेल.

**हिमोत्पन्ना**-स्त्री., आहारद्रव्य० **शर्कराभेदः यावनाली हिमशर्करा** ( रा. १४.१६३; पृ. ९१ )
थंड साखर. ( गुळाची साखर ).

**हिमोद्भवा**-स्त्री., वनस्पति० **काञ्चनक्षीरी** ( रा. ५.३६३; पृ. ५७ )
पिवळा धोत्रा, पिसोळा.
**सठी** ( रा. ६.८७; पृ. १९ ) कचोरा.

**हियावली**-स्त्री., वनस्पति० **ह्यावली इति दक्षिणे** ( हजारी ) ( र. १७.११५ )
हजारी, चुका.

**हिरण्य**-न., खनिज० **अघटितं सुवर्णम्, घटितमिति चक्रः** ( चवि. ८. ९ )
खनिज० **सुवर्णम्** ( ध. ६.१; पृ. २०५ )
सोने, न घडविलेले सोने.

**-जकिट्ट**-न., **हिरण्याज्जातं, यथा सुवर्णकिट्टं, इदं हलीमकव्याधावुपयुज्यते** ( असंचि. १८ )
रुप्याचा मळ, रौप्यमाक्षिक, इंदु सोन्याचे किट्ट असे म्हणतो. हलीमक रोगावर उपयुक्त.

**-पुष्पी**-स्त्री., वनस्पति० **कलिकारी, स्वर्णकेतकी** ( ड. सुशा. १०.११ )
पिवळी केवडी.

**हिरण्याक्ष**-पु., ऋषि० **यज्जःपुरुषविषये विवदमान एकः** ( चसू. २५.१४ )
एक ऋषी. यज्जःपुरुषीय विषयातील वादात भाग घेणारे एक ऋषि.

**हिलमोचिका**-स्त्री., वनस्पति० **वास्तुकम्** ( रापरि. ७.६२; पृ. ३५२ )
चाकवत.

**हिलिमिलि**-पु., **मन्त्रे, ऱ्हां ऱ्हीम् इति उच्चारणम्** ( चचि. २३.९४ )
मंत्रात ऱ्हांऱ्हीं असे उच्चारणे.

**हीन**-वि., **अल्पम्** ( अहृसू. १.१९ ) अल्प, थोडे.

**-कर्ण**-पु., **पञ्चदशकर्णबन्धेष्वेकः, अनधिष्ठानपालिः पर्यन्तयोश्च क्षीणमांसः** ( सुसू. १६.१० )
कानाच्या पंधरा बंधांपैकी एक. ज्या कानाच्या पाळीला आधार नाही तिचे व कडांचे मांस क्षीण झाले आहे असा कान.

**–दग्ध**–वि., **हीनं यथा तथा दग्धः अग्निना क्षारेण वा, यानि हीनातिसम्यग्दग्धलक्षणानि तेष्वन्यतमानि तत्र हीनदग्धलक्षणानि तोदः कण्डूः जाड्यं व्याधिवृद्धिश्च** ( सुसू. ११.२६ )
कमी जळालेला. अग्नि किंवा क्षार यांनी कमी, अति किंवा योग्य जळालेल्या लक्षणांपैकी कमी जळाल्याची लक्षणे. त्यात योग्य प्रमाणापेक्षा कमी प्रमाणात जर डाग दिला गेला तर टोचणी, खाज, जडपणा, रोगाची वाढ होते.

**–दन्तता**–स्त्री., **अल्पदन्तत्वम् दन्तानां सङ्ख्याऽल्पत्वम्** ( कासू. २०.६ )
दातांची संख्या कमी असणे.

**–दृष्टिक**–वि., **अदूरदर्शी** ( चइ. ३.६ ) अदूरदर्शी.

**–योग**–पु., **अल्पयोगः** ( अहसू. १२.३६ )
इंद्रिये व त्यांचे विषय यांचा आरोग्यास उपयुक्त असलेल्या संयोगापेक्षा कमी संयोग–संबंध येणे.

**–योनि**–स्त्री., **स्वल्पा योनिः यस्याः सा ( बाला )** ( काखि. ९.१९ )
लहान योनी असलेली बालिका, स्त्री.

**–रूप**–वि., **दुर्बलः, क्षीणाकृतिः** ( सुशा. ६.२६ )
दुर्बल, दुबळा, क्षीण–कृश–लहान आकृतीचा.

**–विशोधित**–वि., **हीनशुद्धिशोधितः** ( सुचि. ३९.१३-१४ )
योग्य प्रमाणापेक्षा कमी शुद्धि झालेला.

**–वीर्य**–वि., **अल्पवीर्यम्** ( असंसू. ७.२८ )
कमी वीर्याचा, क्षीण वीर्याचा.

**–वेग**–वि., **अल्पवेगः** ( चक. १.१४ )
कमी वेगाचा, हळू जाणारा–चालणारा, कमी गतीचा.

**–सत्त्व**–वि., **अल्पं मनोबलं यस्येति। तल्लक्षणानि–हीनसत्त्वास्तु नात्मना, नापि परैः सत्त्वबलं प्रति शक्यन्ते उपस्तम्भयितुम् महाशरीरा अपि ते स्वल्पानामपि वेदनानामसहा दृश्यन्ते** ( चवि. ८.११९ )
दुबळ्या मनाचा. लक्षण— स्वतः किंवा दुसऱ्यांच्या सहाय्याने–धीर देण्यानेही मनाला बल–शक्ति–धीर आणू शकत नाही तो. तो शरिराने जरी धिप्पाड असला तरी थोड्या वेदनाही सहन करू शकत नाही.

**–स्वरता**–स्त्री., लक्षण० **शब्दह्रस्वत्वम्** ( सुसू. ३२.४ )
लहान आवाज असणे. हळू बोलणे.

**हीनोत्तरौष्ठ**–वि., लक्षण० **स्वभावौष्ठात् अल्पतरौष्ठः** ( सुउ. ४७.२२ )
वरचा ओठ स्वाभाविकपेक्षा लहान बारीक असणे.

**हीर**–न., खनिज० **हीरकम्** ( रा. १३.५८; पृ. २१७ )
हिरा.

**( हीरा )**–स्त्री., वनस्पति० **काश्मरी** ( ध. १.११७; पृ. २८ )
शिवण.

**हीरक**–न., रत्न० **गुणाः– रसषट्कोपेतम्, रसायनदेहदार्ढ्यायुष्करं सर्वरोगनाशनम्** ( ध. ६.५५; पृ. २१६ ) खनिज० **वज्रम्** ( र. ४.२-३ ) **तस्य द्रुतिविधानम्–वज्रवल्लीजटायाः पिण्डमध्ये हीरकं स्थापयित्वा निरोधयेत्। ततः पोटल्यादिकं कृत्वा काञ्जिकादिपूरितपात्रे दोलाविधिना सप्तदिनपर्यन्तं स्वेदनं कार्यम्। एतादृशविधिना सप्ताहानन्तरं हीरकं द्रुतिं गच्छेत्।**
हिं.— हिरा.
**म.— हिरा.**
गु.— हिरो.
बं.— हिरे.
फा.— इल्माशः
**हिरा.** गुण–सहा रसाचा. रसादि धातूचे, उत्तम पोषण करणारा, शरीर दृढ करणारा, आयुष्य वर्धक व सर्व रोगनाशक. हिऱ्याची द्रुती ( द्रव ) **करण्याचा विधि**–हाडसंधी वेलीच्या मुळ्यांच्या चटणीत हिरा ठेवून त्याची पुटली ( पोटली ) बांधावी. ती कांजी इत्यादी घातलेल्या भांड्यात दोलायंत्राच्या विधीप्रमाणे सात दिवस पर्यंत वाफवावी. म्हणजे तो हिरा पातळ होतो.

**हुडम्ब**–पु., वनस्पति० **गोधूमः** ( ध. ६.९७.पृ.२२७ )
गहू.

**हुण्डन**–न., **शिरःप्रभृतीनामन्तःप्रवेशः यथा शिरोनासाक्षिप्रभृतीनाम्** ( चक. चचि. २८.२२ )
डोके, नाक, डोळे इत्यादी आत जाणे ( पुढे झुकणे ) बसणे, नाक बसणे, डोळे खोल जाणे, मान खचणे इ०

**हुत**–न., **हविर्द्रव्यम्** ( चचि. ३. ३१२ )
अग्नीला आहुती देण्याचे द्रव्य. आहुती.
वि., **अग्नौ आहुतम्** ( चचि. ३.३१२ ).
अग्नीत टाकावयाची आहुती.

**-भक्ष**-पु., हुतं भक्षयतीति हुताशनः, अग्निः ( चचि. ३. ३१२ )
आहुति खाणारा हुताशन. ( अग्नी ).

**-भुज्**-पु., वनस्पति० चित्रकः सर्वे अग्निपर्यायाः चित्रकाभिधायका इति संकेतोऽत्रानुसन्धेयः ( ड. सुउ. ५२.३० )
चित्रक, सर्व अग्नीचे पर्याय चित्रकाचे बोधक आहेत.
वह्निः ( सुक. १.२९ ) अग्नी.

**-वह**-पु., अग्निः ( सुचि. ८.२४ ) अग्नी.

**हुताश**-पु., वनस्पति० चित्रकः (सुउ. ४१.४७) चित्रक.

**हुताशन**-पु., जठरोऽग्निः ( ड. सुउ. ३९.१७ ) जठराग्नी.
वनस्पति० चित्रकः ( सुउ. ६१.३२ ) चित्रक.

**हुताशमन्थ**-पु., वनस्पति० अग्निमन्थः (र. १२.७४.)
अरणी, टाकळी.

**हुताशवेश**-पु., ऋषि० अग्निवेशः ( चचि. ७.१८० )
अग्निवेश ऋषि.

**हृत्**-न., शारीर० हृदयम् ( चसू. १७.३; सुसू. ४६.५११ )
हृदय.

**-कम्प**-पु., लक्षण० हृदयस्य कम्पनवत् पीडा ( सुसू. १५.९ )
हृदयामध्ये कंप झाल्यासारखी वेदना.

**-पीडा**-स्त्री., लक्षण० हृत्पीडनम् ( सुसू. १५.९ )
हृदयात होणारी पीडा.

**-प्रदोष**-पु., हृद्रोगः ( चचि. २६.८९ )
हृदयाचा रोग.

**-प्राप्ति**-स्त्री., हृद्रोगः निरूहबस्तेरसम्यक्योगसंभवा व्यापत् वर्तते ( चसि. ७.५ )
हृद्रोग. निरूहबस्तीच्या अयोग्य प्रमाणामुळे होणारी विकृती.

**-संशुद्धि**-स्त्री., लक्षण० हृदयगतदोषशोधनम् ( चसू. ५.३७ )
हृदयातील दोषांची शुद्धि.

**( -स्तम्भ )** पु., लक्षण० हृदयस्य स्तब्धत्वमिवानुभूतिः ( चचि. २६.७९ )
हृदय जखडल्यासारखी वेदना.

**( हृच् )-शुद्धी**-स्त्री., लक्षण० हृदयगौरवाभावः ( चसू. १६.५ )
शुद्धि, हृदयात वाटणारा जडपणा नाहीसा होणे.

**-छून्यभाव**-पु., लक्षण० हृदि शून्यत्वमिवाभासः ( चचि. २६.७९ )
हृदय शून्य आहे-पोकळ आहे असा आभास.

**-छूल**-पु., रोग० हृदयशूलः, कफपित्तावरुद्धो वायुः रसमूर्च्छितो, भूत्वा हृदिस्थः सन् शूलं कुरुते। अयं शूलः परमुच्छ्वासरोधकः। अस्य व्याधेः हृच्छूल इति नाम, स च रसमारुतसंभवः ( सुउ. ४२.१३१-१३२ )
हृदयातील शूल. कफपित्तांच्या वृद्धीने अडवलेला वात रस धातूशी युक्त होऊन हृदयात जातो. आणि शूल उत्पन्न करितो शूलामुळे श्वास घेण्याला अतिशय अडचण भासते, श्वास घेताच येत नाही. हा रसमारुता पासून होतो.

**-छोष**-पु., लक्षण० हृदयशुष्कता ( चचि. २६.७९ )
हृदय शुष्क होणे. गळ्यापासून छातीत सुकलेले वाटणे.

**( हृद् )-गद**-पु., रोग० हृद्रोगः ( असंनि. ५.३७; अहसू. ४.२ )
हृदयाचा रोग.

**-ग्रह**-पु., लक्षण० हृदयस्य ग्रहः, हृदयस्य बन्धनवद् वेदनाविशेषः इति हाराणचन्द्रः ( चनि. ७.६ )
हृदय बांधल्याप्रमाणे वेदना. हृदय जखडल्यासारखे भासणे.

**-घट्टन**-न., लक्षण० हृदयस्य घट्टनमिव वेदना ( चसू. १७.१०१ )
हृदय आवळल्यासारखी वेदना.

**-दाह**-पु., लक्षण० हृदि दाहः ( चसू. १७.३३ )
हृदयात दाह.

**-द्रव**-पु., लक्षण० हृन्मार्दवम् द्रवति इति हृदयं धुगधगिति करोति ( चसू. २०.११; १७.६४ )
हृदय धडधडणे, धडधड.
हृदि कम्पः, अनुकम्पयेव पीडा हृदयस्य ( अहसू. ११.१६ )
हृदयात कंप झाल्यासारखी पीडा.

**-धात्री**-स्त्री., वनस्पति० हिमावली ( रापरि. ६.१८ )
हिमावली वस्नु. गाठाळ वनस्पती.

**-धूमायन**-न., ( परिव० ) लक्षण० हृदयस्य धूमापनम् धूमोद्गमनवत्पीडाविशेषः ( असंसू. २७.२० )
छातीतून घशात व तेथून धूर ओकल्याप्रमाणे पीडा होणे.

**–भेद्**–पु., लक्षण० हृदयस्य भेदनवत् पीडा (चचि. २६.७९)

हृदय फोडल्याप्रमाणे पीडा.

**–रुज्**–स्त्री., लक्षण० हृदयस्य रुजा, हृदयस्य वेदना (अहृसू. १५.४५)

हृदयात वेदना. हृदयातील पीडा.

**–रोग**–पु., रोग० अस्मिन् कुपिता दोषाः रसं दूषयित्वा हृदयं गत्वा हृद्रोगं कुर्वन्ति (सुउ. ४३.४) **चतुर्विधो हृद्रोगः, दोषैस्त्रिभिः, कृमिभिश्च चतुर्थ इति । सुश्रुतमूलवचने हृद्रोगाश्चत्वार एव । डल्हणस्तु कृमिज एव सान्निपातिको हृद्रोग इति वर्णयति । चरके तु पञ्च हृद्रोगाः पृथक्दोषैस्त्रयः संनिपातेन चतुर्थः पञ्चमस्तु कृमिभिरिति । माधवे नाम माधवनिदाने चरकस्यैव मतं स्वीकृतम्** (सुउ. ४३.५) **वातजो हृद्रोगः–तत्र हृदयस्यायमनं, तोदः, निर्मथनं, दारुणं स्फोट पाटनमित्याद्याकारा वेदना भवन्ति** (सुउ. ४३.६) **पित्तजो हृद्रोगः–तत्र ऊषा तृषा दाहश्चोषो हृदयक्लमो धूमायनं मूर्च्छा स्वेदः मुखशोष इति पित्तहृद्रोग–लिङ्गानि** (सुउ. ४३.७) **कफजहृद्रोगे गौरवं कफसंस्रावोऽरुचिरग्निमार्दवमास्यमाधुर्यमिति लक्षणानि** (सुउ. ४३.८) **कृमिजो हृद्रोगः–तत्र उत्क्लेशः ष्ठीवनं तोदः शूलो हृल्लासस्तमोऽरुचिः श्यावनेत्रता शोष इत्येतानि लिङ्गानि** (सुउ. ४३.९) **कृमिहीनानां वातादिजानां हृद्रोगस्योपद्रवाः एते–श्रमः क्लमः सादः शोषश्चेति** (सुउ. ४३.१०) **कफदुष्टक्षीरगौरवात् तादृशं दुष्टं क्षीरं पिबतः शिशोः हृद्रोगो भवति** (चचि. ३०.२४९-५०)

हृदयाचा रोग—प्रकुपित झालेले दोष रस दूषित करून हृदयात जाऊन हृद्रोग करतात. चार प्रकार. तिन्ही दोषांचे तीन व कृमींनी होणारा चौथा. डल्हण कृमिजालाच सान्निपातिक म्हणतात. चरक वरील हृद्रोग सांगून शिवाय पांचवा संनिपातज सांगतात. माधव, चरकाप्रमाणेच सांगतात. **वातज हृद्रोग**— हृदय ताणले जाणे, टोचणी, घुसळणे, अत्यंत त्रासदायक फुटल्याप्रमाणे, फाडल्या प्रमाणे वाटणे इत्यादी प्रकारच्या वेदना होतात. **पित्तज**–हृदयात दाह, सर्वांग दाह, तहान, चोखल्या प्रमाणे वेदना, हृदय थकणे, धूर निघणे, मूर्च्छा, घाम, तोंड सुकणे. **कफज**—जडपणा, कफ पडणे, रुचिनाश, अग्निमांद्य, तोंड गोड होणे. **कृमिज**—घशाशी येणे, थुंकी, टोचणी, शूल, तोंडाला पाणी सुटणे, अंधेरी, रुचिनाश, डोळे काळसर शोष. **उपद्रव**— भ्रम, गळाठा, अंग गळणे, आणि क्षय. हे कृमिज हृद्रोगाखेरीज वातादिजन्य हृद्रोगाचे होत. कफाने दुष्ट दूध पिणाऱ्या बालकाला ते जड झाल्याने हृद्रोग होतो.

**–रोगज**–वि., हृद्रोगाज्जातं वैवर्ण्यादि (चचि. २६.७८)

हृद्रोगाने होणारे वर्णाचा बिघाडा इत्यादी.

**–रोगप्रतिषेध**–पु., अध्यायसंज्ञा० (सुउ. ४३.१)

अध्यायाचे नाव. यात हृद्रोगाचे उपचार आहेत.

**–वल्लिका**–स्त्री., वनस्पतिविशेषः (र. १२.१०७)

एक वनस्पती.

**–विकर्तिका**–स्त्री., लक्षण० हृदयपरिकर्तिकाकारा वेदना (चचि. २६.८४)

हृदयात कापल्याप्रमाणे होणाऱ्या वेदना. कातरल्या सारखी वेदना.

**–विरुद्ध**–न., अमनोरुचितम्, अहृद्यम्— (चसू. २६. १००)

मनाला न आवडणारे – न रुचणारे. हृदयाला अहितकर.

**–विशोधन**– न., उपक्रम० वमनद्वारा हृदयाश्रितानां विषादिदोषाणां निर्हरणम् (चचि २३. २३९ अहृसू. ७.२७)

हृदयाचे शोधन. हृदयातील विष इत्यादी दोष बाहेर काढणे. वांती द्वारे ते बाहेर काढणे.

**–व्यथा**–स्त्री., लक्षण० हृदयस्य व्यथा (असंसू.५.२३)

हृदयाची पीडा—व्यथा.

**हृतदोष**–वि., हृतः दोषाः यस्य, सः (चसि. ६.१९-२०)

ज्याचे दोष हरण केले आहेत तो. शुध्द, निर्दोष, निर्मल.

**हृतौजस्**–वि., लक्षण० क्षीणौजाः (असंसू. ५.३०)

क्षीणौज ओज क्षय झालेला.

**ज्वर० सन्निपातज्वर० अभिन्यासज्वरभेदः** (सुउ. ३९.४१-४२)

ओज क्षीणतेने येणारा सांनिपातिकज्वर; अभिन्यास ज्वराचा प्रकार.

**हृदभिघात**–परिव० पु. हृदयाभिघातः (चसि. ९.६)

हृदयावर झालेला आघात.

**हृदय**–न., शारीर०उरःस्थोऽवयवः ( चक. १.५ ) स्तनयोर्मध्यमधिष्ठाय उरसि आमाशयद्वारं हृदयं तिष्ठति ( सुशा. ६.२५ ) स्तनोरःकोष्ठमध्यगम् ( अहृशा. ४.१३ ) पुण्डरीकेण सदृशं हृदयमधोमुखं तिष्ठति, जाग्रतः तद्विकसति, निमीलति च स्वपतः ( सुशा. ४.३२ ) हृदयस्याधो वामतः प्लीहा फुप्फुसश्च । दक्षिणतः यकृत् क्लोम च; शोणितकफप्रसादजं, हृदयं, तदाश्रया हि धमन्यः प्राणवहाः । तद्विशेषेण चेतनाः स्थानम् । अतस्तस्मिंस्तमसावृते सर्वे प्राणिनः स्वपन्ति ( सुशा. ४.३१ ) मांसपेशीचयरूपं रक्तपद्माकारमधोमुखम् ( अरुण. अहृसू. १२.१५ ) गर्भावस्थायां चतुर्थे मासि गर्भहृदयस्याभिव्यक्तिः भवति (सुशा. ३.१८) पुण्डरीकाकारहृदयस्य संबन्धिन्यो नाड्यो हृदयमांसपिण्डात् सर्वतो विनिःसृताः इति बृहदारण्यकोपनिषदि ! हृदयं रसवहानां स्रोतसां मूलम्, प्राणवहानां स्रोतसां मूलम्, व्यानवायोः स्थानम्, रसस्थानम् ( चवि. ५.८ ) ओजःस्थानम् ( अहृशा. ३.१३ ) अन्तरात्मनः श्रेष्ठतममायतनम् ( चनि. ८.४ ) हृदयमेकं चेतनाधिष्ठानं च ( चसू. ३०.३-५-७ ) हृदयतो रस धातुः शरीरे सर्वतः सिराभिर्निःसरति । स एव सिराभिः हृदयं चैति इति भेलसंहितायाम् । रसो यः स्वच्छतां यातः ( फुप्फुसात् ) स तत्रैव पुनः अवतिष्ठते । अनंतरं व्यानेन विक्षिप्तः स रसः कृत्स्नं देहं प्रपद्यते ( अरु. अहृसू. १२.१५ ) हृदिस्थितेन व्यानेन रसस्य सर्वदेहे विक्षेपणं भवति ( अहृसू. १२.६ ) देहिनां देहे हृदयं सुखदुःखप्रकाशकं तच्च स्वतः पुनः पुनः संकोचविकासांश्च करोति । इति नाडीज्ञाने । प्राणवायुः हृदयधारकः (अहृसू. १२.४ ) उरःस्थोऽवलम्बककफः स्ववीर्यादन्नवीर्यात च हृदयस्यावलम्बनं करोति (अहृसू. १२.१५) दशप्राणायनेष्वेकम् (चसू. २९.३) पञ्चदशकोष्ठाङ्गेष्वेकम् ( चशा. ७.१० ) मनोऽधिष्ठानम् ( हे. अहृसू. १२.४ ) मर्म० सिराममेंदम्, तस्य स्थानमुरः, तत्रापि स्तनयोर्मध्ये, एतत्संख्ययैकम्, मानतश्चतुरङ्गुलम्, तत्स्वरूपम्–कमलमुकुलाकारमधोमुखं च, एतत्सद्यःप्राणहरं मर्म ( सुशा. ६.६ )

**हृदय**–उरस्थानातील अवयव. हा दोन्ही स्तनांच्या मध्ये राहून उरस्थानात आमाशयाच्या तोंडाशी असतो, स्तन, उर व कोष्ठमध्यात असणारा. मिटलेल्या पुंडरीक कमळाप्रमाणे याचे मुख आहे. खाली तोंड करून राहतो, जागेपणी तो विकसतो व झोपेत तो मिटतो. हृदयाच्या खाली डावीकडे प्लीहा व फुप्फुस आणि दक्षिणकडे यकृत् व क्लोम. हृदय हा अवयव कफाचा व रक्ताचा जो प्रसादरूप–साररूप अंश त्यापासून बनला आहे. त्याच्या आश्रयाने प्राण वहन करणाऱ्या धमन्या आहेत, ते विशेषत्वाने चेतनेचे (ज्ञानाचे स्थान आहे.) म्हणून तेथे तमाचे आवरण आले की सर्व प्राणी झोपतात. मांस पेशींनी बनलेला तांबड्या कमळा प्रमाणे खाली तोंड केलेला अवयव. गर्भावस्थेत चौथ्या महिन्यात गर्भाच्या हृदयाची अभिव्यक्ति होते. पुंडरीकाकार हृदयाशी संबध्द नाड्या हृदय मांस पिंडापासून सर्वत्र पसरल्या आहेत. असे बृहदारण्यक उपनिषदांत आहे. हृदय रसवह व प्राणवह स्रोतसांचे मूळ आहे. व्यानवायूचे स्थान आहे. रसाचे स्थान आहे, ओजाचे अंतरात्म्याचे सर्वांत श्रेष्ठ असे निवास स्थान आहे, चेतनेचे ते एक अधिष्ठान आहे. हृदयातून रस धातु शरिरात सर्वत्र शिरांनी पसरतो, त्याच शिरांनी पुन्हा हृदयाला परत येतो. जो रस (फुप्फुसातून) स्वच्छ होऊन येतो तो हृदयातच रहातो, तेथून नंतर तो व्यानाने फेकला जाऊन सर्व शरिरात येतो, हृदयातील व्यानाने सर्व शरीरभर रस धातु पोहोचविला जातो प्राणीमात्राचे सुखदुःख प्रकाशक हृदय आहे. हृदय स्वतः पुनःपुन्हा संकोच विकास करते. प्राणवायु हृदयधारक आहे. उरःस्थानांतील अवलंबक कफ अन्नाच्या व स्वतःच्या वीर्यामुळे हृदयाचे धारण करतो. प्राणाच्या दहा निवास स्थानांपैकी हृदय एक आहे. १५ कोष्टांतील एक. एक उर स्थानांतील दोन स्तनांतील मर्म. शिरा मर्म. संख्येने एक. प्रमाण चार अंगुले. कमळाच्या कळीसारखे खाली तोंड केलेले. ताबडतोब प्राणहारक. हृदय मनाचे अधिष्ठान आहे.

**मनः** ( चवि. ८.९४ ) मन, चित्त.

**–कर्षण**–न., लक्षण० हृदये आकर्षणवत्पीडा ( सुसू. ४२.९ )

हृदयात ओढ लागल्यासारखी वेदना,

**-क्लम**-पु., लक्षण० हृदयस्य दौर्बल्यम्, क्लान्तिः ( सुउ. ४३.७ )
हृदयाची दुर्बलता, थकवा.

**-क्षणन**-न., लक्षण० उरःक्षतम् ( का विशेषकल्पाध्यायः )
छातीत जखम होणे.

**-ग्रह**-पु., लक्षण० हृदयं केनचिदाकर्षणवत् संज्ञा ( चनि. ८.६; सुचि. ३४.१० )
हृदय कोणी ओढल्याप्रमाणे वेदना.

**-चर**-पु., श्लेष्मजक्रिमि० ( चवि. ७.१२ )
द्र० ' **कृमि** '
कफाचा एक क्रिमि.

**-द्रव**-पु., लक्षण० परिश्रान्तस्येव हृदयक्षोभः, च ( चचि. २०.२४ )
थकल्यासारखा हृदयाचा क्षोभ. हृदयात धडधड होणे.

**-नाडी**-स्त्री., शारीर० मण्डलसन्धिस्थानम् ( सुशा. ५.२७ )
हृदयाची नाडी, मंडळ ( वाटोळ्या ) संधीचे स्थान.

**-प्रलेप**-पु., लक्षण० हृदये भूरिभारवत्पीडा ( चसू. २१.४६ )
हृदयात फार वजन असल्यासारखी पीडा, हृदय जड वाटणे, हृदय लपेटल्यासारखे वाटणे.

**-प्रिय**-वि., मनःप्रियः ( सुसू. ४६.४०७ )
मनाला आवडणारे, मनाला प्रिय.

**-रक्षा**-स्त्री., उपक्रम० हृदयरक्षणम् ( चक्र. चचि. २३.३२ )
हृदयाचे रक्षण.

**-रोधन**-न., लक्षण० मनसः क्रियाप्रतिबन्धः ( अहसू. ७.२३ )
मनोव्यापारांना अडथळा.

**-विकर्षण**-न., लक्षण० हृदयस्याकर्षणम् ( असंसू. २७.३ )
हृदयाला ओढ लागणे.

**-विबन्ध**-पु., लक्षण० हृदयस्यान्तःस्तम्भवत् वेदना ( अहसू ४.८ )
हृदय जखडल्याप्रमाणे वेदना.

**-शूल**-न., लक्षण० हृदये शूलवत् वेदना ( असंसू. २७.१० )
हृदयात शूल झाल्याप्रमाणे वेदना.

**-स्पन्दन**-न., लक्षण० हृदयस्य गतिः, हृदयस्य स्पन्दनम् ( चचि. १६.१२ ) हृदयाची धडधड.

**हृदशुद्धि**- स्त्री., हृदये दोषसंचितिः ( सुचि. ३३.२४ )
हृदय अशुद्ध होणे, हृदयात दोष संचय होणे.

**हृदामय**-पु., रोग० हृद्रोगः ( चचि. २६.९४ ) हृद्रोग.

**हृदुत्क्लेश**-पु. लक्षण० हृल्लासः, अचिरादेव वमनसूचिका अवस्था ( चचि. २०६ सुउ. ४२.१४३ )
तोंडाला पाणी सुटणे. आताच वांती होणार असे सुचविणारी अवस्था.

**( हृन् )-नाल**-न., खनिज० तीक्ष्णलोहप्रकाराणामन्यतमम् ( र. ५.८० ) द्र० ' **लोह** '
पोलादाच्या प्रकारांपैकी एक.

**-मोह**-पु., लक्षण० हृदो मोहः उन्मादवदल्पा विकृतिः ( चसू. २०.११ )
उन्मादासारखी अल्प विकृती.

**( हृल् )-लास**-पु., लक्षण० हृदयस्य उत्क्लेशनम् ( सुउ. ५६.२१-२२ )
दोष उचंबळून येणे, तोंडाला पाणी सुटणे.
थूत्करणम् ( ड. सुसू. ३८.५०-५१ ) थुंकणे.

**-लासिका**-स्त्री., लक्षण० हृल्लासः ( चसि. १.४३ )
तोंडाला पाणी सुटणे.

**-लेप**-पु., लक्षण० हृदिलेपवत् संवेदनाविशेषः ( चसि. ७.९ )
हृदयात लपेटल्यासारखे वाटणे.

**हृदयाद**-पु., कफज-क्रिमि० ( चसू. १९.४ (९).६ )
द्र० ' **कृमि** '
एक प्रकारचा कफज क्रिमि.

**हृदयापकर्तिन्**-वि., लक्षण० हृदयपरिकर्तनरूपवेदनायुक्तम् ( चवि. १.१७ )
हृदयात कातरल्यासारख्या वेदनांनी युक्त.

**हृदयापकर्षण**-न., लक्षण० हृदयहिंसनम् हृदयविकर्षणम् ( चक्र. चसि. २.९ )
हृदयाला खाली ओढ लागणे. हृदयाला खेचल्यासारखी वेदना, हृदयावर आघात.

**हृदयापसरण**-न., रोग० पीतौषधस्य भेषजोद्गारच्छर्दीनां निग्रहात् वातादयः कुपिता हृदयमुपश्रित्य हृद्ग्रहं घोरमावहन्ति । ततः प्रधानमर्मोपतापात् वेदनाभिरत्यर्थमातुरः पीड्यते । मोहहिध्माकासलालापार्श्वशूलयुतो वेपथुमान्नष्टसंज्ञो दन्तान्कटकटायत्युद्धृताक्षो जिह्वां खादति । तं रोगं हृदया-

पसरणमाहुः । तस्मै रुग्णाय भिषक् शीघ्रमभ्यङ्गपूर्वं धान्यस्वेदेन परिस्वेद्य तीक्ष्णमवपीडं नस्यं दद्यात् । यष्टीमधुकमिश्रेण तन्दुलाम्बुना वमनम् आचर्यम् । कटुभिर्वा कफोत्तरस्य । ततो दोषशेषं पाचनीयैः पाचयेत् । यथादोषोच्छ्रयं च बस्तीन् वितरेत् ( असंक. ३ )

हृदय जखडणे व **हृदयात अति वेदना** --औषध प्याल्यावर त्या औषधाचे ढेकर व वांती इत्यादिकांचे उत्सर्जनाचे वेग अडविले तर वातादी दोष प्रकुपित होऊन तीव्रतर स्वरूपात हृदयाची पकड घेतात. तेव्हा हृदय जखडले जाते, मुख्य मर्मच ते असल्यामुळे रोगी वेदनांनी अतीशय बेजार होतो, विचार कुंठित होतात, उचकी, खोकला, लाळ गळणे, फासळ्यात शूळ, कंप, दात कडकड चावणे, जीभ चावणे. डोळे वर जाणे ही चिन्हे होतात व बेशुद्ध होतो. त्या रोग्याला वैद्याने न घाबरता ताबडतोब अभ्यंग करून धान्य शिजवून त्या पोटिसाने सर्वांग शेकून अवपीडक नावाचे नस्य तीक्ष्ण द्यावे. नंतर ज्येष्ठमध मिश्र करून तांदळाच्या पाण्याबरोबर ओकारीचे औषध द्यावे. कफदोष अधिक असल्यास तिखट द्रव्ये अधिक घालावीत. नंतर शिल्लक दोषांचे पचन पाचक औषधे देऊन करावे. दोषांना अनुसरून बस्ति द्यावेत.

**हृदयामय**–पु., **रोग०** हृद्रोगः ( चसू. १७.६ )
हृद्रोग. हृदयाचा विकार.

**हृदयावरण**–न., **उपक्रम०** हृदयरक्षणम् ( चचि. २३.४६ )
हृदयाचे रक्षण करणे.
**हृदयप्रच्छादनम्** ( ड. सुक. १.७९ )
हृदयाचे आवरण. हृदयाचे रक्षण करणारे द्रव्य.

**हृदयावलम्बन**–न., हृदयस्य **स्वकार्यसामर्थ्यम्** ( ड. सुसू. २१.१४ )
हृदयाचे अवलंबन, स्वतःच्या कार्याचे सामर्थ्य.

**हृदयाविशुद्धि**–स्त्री., लक्षण० **हृदये दोषशेषत्वम्**, **हीनदोषापहृतत्वरूपायाः वमनव्यापद्, इदं लक्षणं भवति** ( सुचि. ३४-८ )
हृदयात दोष शिल्लक रहाणे. दोष संपूर्णतया बाहेर न निघणे. हा वमनविधीतील हीन योगाचा उपद्रव.
**हृदयस्य दोषेण युक्तत्वम्, तल्लक्षणं गौरवम्** ( चसू. १६.७ )
दोषानी हृदय युक्त असणे. ते जड वाटणे, हे लक्षण विरेचन चांगले न झाल्याचे लक्षण.

**हृदयोत्क्लेद**–पु., लक्षण० हृल्लासः ( सुसू. १५.१४ )
तोंडाला पाणी सुटणे, उम्हासे घशाशी येणे.

**हृदयोद्वेष्टन**–न., लक्षण० हृदयस्यावमोटनम् ( ड. सुउ. ३९.११६ )
हृदय पिरगळल्यासारखे वाटणे.

**हृदयोपरोध**–पु., लक्षण० **हृदये रोधवत् पीडा** ( चचि. २३.११४ )
हृदयात बांध आहे अशी पीडा.
**हृदयावरणम्**, लक्षण० ( सुउ. ५५.७ )
हृदय वेष्टल्यासारखे होणे.

**हृदयोपरोधन**–न., ( परिव० ) लक्षण० हृत्पीडा ( अहसू. ४.३ )
हृदय जखडल्यासारखी पीडा.

**हृदयोपलेप**–पु., लक्षण० **हृदयस्य स्तैमित्यम्, हृदये लेपवत्प्रतिपत्तिः** ( चसू. २०.१७ )
हृदयाला लेप बसला आहे असे वाटणे, लेपाचा भास.

**हृदयोपसरण**–न., लक्षण० हृद्द्रवः ( चक्र. चसू. १५.१३; सुचि. ३४.३ )
हृदय जखडल्यासारखे वाटणे.

**हृद्य**–वि., **हृदयाय हितम्** (चसू. ४.८ ) **यथा आम्राम्रातकलिकुचकरमर्दवृक्षाम्लाम्लवेतसकुवलबदरदाडिममातुलुङ्गानीति दशेमानि हृद्यानि भवन्ति** ( चसू. ४.१०; सुचि. २४.२३ )
हृदयाला हितकर. जसे–आंबा, आंबाडा, ओट, करवंद, अमसूल, आम्लवेतस, कमळ, बोर, डाळिंब, महाळुंग, ही दहा हृदयाला हितकर आहेत.
**मनोज्ञम्** ( सुउ. ६०.३४ ) मनाला आवडणारे.
**वनस्पति० जीरकम्** ( ध. २.६६; पृ. ८२ ) जिरे.

**( हृद्या )**–स्त्री., वनस्पति० **सल्लकी** ( रा. ११.१९६; पृ. १२२ ).
साळई.

**–गन्ध**–पु., वनस्पति० बिल्वः (ध. १.१०६; पृ. २६)
बेल.
**न., लवणभेदः काचलवणम्** (रा. ६.४५; पृ. ७५)
काच मीठ.

**( -गन्धा )**–स्त्री., **वनस्पति० जाती** ( ध. ५.१३७ पृ. १९८ ) जाई.
**अजमोदा** ( रा.६.१५१; पृ. ९० ) अजमोदा, ओवा.

**-गन्धक**-न., वनस्पति० अक्षम् (ध. २.३०; पृ. ७४) पादेलोण.

**हृष्ट**-वि., स्तब्धम् ( च. चसि. ९.५४ ) ताठ, न हालणारे.

**-रोमन्**-वि., लक्षण० स्तब्धानि रोमाणि यस्य सः ( चइ. ६.१६ )

केस ताठ असलेला, रोमांच असलेला.

**हृष्टाङ्ग**-वि., लक्षण० उद्धर्षितशरीरः ( ड. सुक. ४.४२ ) अंगावर रोमांच उभे असलेला.

**हृष्टाङ्गज**-वि., लक्षण० हृष्टरोमा अङ्गजा रोमाणि इति यावत् ( चचि. १०.११ )

अंगज म्हणजे केस. अंगावर रोमांच उभे असलेला.

**हेतु**-पु., निदानम् ( चनि. १.३ ) कारणम् (चसू. १.२४) हेतु, कारण, रोगकारण.

उपायः ( सुसू. २७.४ ) उपाय.

कारकहेतुः ( सुसू. ३.१४ ) करणारे कारण.

न्यायावयव० उदाहरणसाधर्म्यात् साध्यसाधनं हेतुः। यथा वह्नौ साध्ये, धूमादिति हेतुवचनम्। यथा च नित्यः पुरुष इति प्रतिज्ञा, तत्र हेतुरकृत-त्वादिति ( चवि. ८.३१ )

न्यायशास्त्रात व्याप्तीचा एक अवयव. साध्याचे साधन. जसे पर्वत वन्हिमान यात साध्य वन्हि आहे. हे साध्य सिद्ध करण्याचे साधन-हेतु धूर आहे, धुराचे दर्शन झाले म्हणून तेथे वन्हि आहे असे म्हणता येते म्हणून धूर हा हेतु. तसेच पुरुष नित्य आहे अशी प्रतिज्ञा. यात अकृतकत्व हा हेतु आहे.

उपलब्धिकारणम् प्रमाणमिति यावत् तत्प्रत्यक्षमनु-मानमैतिह्यमौपम्यमिति ( चवि. ८.३३ )

ज्ञान होण्याचे कारण-प्रमाण. प्रत्यक्ष, अनुमान, परंपरागत ज्ञान, उपमान ही प्रमाणे होत.

**-प्रतिद्वन्द्व**-वि., हेतुप्रत्यनीकम् ( चसू. ७.४४ ) हेतुविपरीत, कारणविरोधी.

**-मत्**-वि., औचित्यादिहेतुनिर्देशोपपन्नम् ( चक्र. चसू. ६.५१ )

हेतुसह, कारणासह, उपपत्तीसह, योग्यायोग्य कारण-दर्शक.

**-विपरीत**-वि., निदानविपरीतम् (असंसू. १२.१७ ) कारणरूप द्रव्यगुणकर्मांच्या विपरीत.

**-विपर्यय**-वि., हेतोरभावत्वेन हेतुविपरीतम् ( अहसू. ८.२३ )

हेतूचा-कारणाचा अभाव, हा कारण विपरीत.



**-व्याधिविपरीत**-वि., रोगस्यहेतोः विपरीतं तथा रोगस्यापि विपरीतम् ( औषधादि ) ( चवि. ३.१३ )

रोगाचे कारण व स्वतः रोग या दोहोंच्या विपरीत म्हणजे उलट गुणकर्माचे ( औषध इत्यादी. )

**हेत्वन्तर**-न., तन्त्रयुक्ति० न्याये पदार्थ० प्रकृतहेतौ वाच्ये यद् विकृतहेतुमाह ( चवि. ८.६३ )

तंत्रयुक्ति, स्वाभाविक वास्तव हेतु बोलण्याच्या ऐवजी विकृत हेतु सांगणे.

**हेत्वर्थ**-पु., तन्त्रयुक्ति० हेत्वर्थो नाम यदन्यत्राभि-हितमन्यत्रोपपद्यते। यथा-'समानगुणाभ्यासो हि धातूनां वृद्धिकारणम्' इति वातमधि-कृत्योक्तम्। तत्र वातस्येति वक्तव्ये यदयं समान-शब्दं धातूनामिति करोति। तेन यथा वायोस्तथा रसादीनामपि समानगुणाभ्यासो वृद्धिकारणमिति गम्यते ( चसि. १२.४१ ) यथा-मृत्पिंडः अद्भिः प्रक्लिद्यते तथा माषदुग्धप्रभृतिभिर्व्रणः प्रक्लिद्यते इति ( सुउ. ६५.११ )

**हेतूचा अर्थ**—तंत्रयुक्ति. जे एके ठिकाणी प्रासं-गिक सांगितले जाते तेच दुसरीकडे लागू पडते म्हणून त्याचा उल्लेख करतात. जसे धातूंच्या समान गुणांचा अभ्यास ( सतत सेवन ) धातूंच्या वृद्धीचे कारण होतो, असे वाताच्या विवरण प्रसंगी सांगितले. येथे वाताबद्दल सांगताना जो हा शब्द 'धातूनाम्' वापरला त्या योगाने वाताच्या तसेच पित्तकफ आणि रसादिकांच्याही वृद्धीचे कारण होतो, असे समजले जाते. जसे ढेकूळ पाण्याने ओले होते तसा व्रण उडीद, दूध इत्यादींनी ओला-स्रावयुक्त होतो.

हेतोः प्रयोजनम् ( चनि. ८.२५ )

कारणाचे प्रयोजन, उद्देश.

**हेत्वर्थकारिन्**-वि., रक्तपित्तादिव्याध्युत्पादकः ( रोगः ) ( चनि. ८.२४ )

कारणीभूत होणारा. रक्तपित्त इत्यादी रोग उत्पन्न करणारा (रोग- ज्वर इत्यादी.) कारणाचे कार्य करणारा

**हेत्वाभास**-पु., न्याये पदार्थ० हेतुवदाभासते इति. ( चवि. ८.५९ )

कारणाचा आभास निर्माण करणारा. कारण भासणारा.

**हेम**-पु., मान० अण्डिका ( चक. १२.८८ )

माषकः ( असंक. ८ ) १ मासा वजन.

वनस्पति० मञ्जिष्ठा ( अहसू. २७.१ ) मंजिष्ठ,

**(हेमा)**-स्त्री., वनस्पति० गुणाः-मधुरा, शिशिरा, वृष्या चक्षुष्या, बलवर्धिनी, वातपित्तजित्, असृग्दाहजिच्च ( रा. परि. ३.१३; पृ. ३३० )
पिवळ्या फुलांची व पानांची पिवळी वेल. **गुण**— गोड, थंड शुक्र व डोळे यांना हितकर, बलवर्धक, वातपित्तनाशक, रक्तदोष व दाह कमी करणारी.

**-काञ्चन**-न., वनस्पति० नागकेसरम् ( ध. २.४८; पृ. ७९ ) नागकेशर.

**-कान्ता**- स्त्री., वनस्पति० दारुहरिद्रा ( ध. १५९. पृ. १८ ) दारुहळद.

**-किञ्जल्क**-न., वनस्पति० नागकेसरम् ( रा. ६.७४; पृ.७९ ) नागकेशर.

**-केतकी**-स्त्री., वनस्पति० केतकीभेदः, सुवर्णकेतकी, द्र० केतकी ( रा परि. १०.३ पृ. २०४ )
सोनकेवडा. पिवळा केवडा, केवडी. केवड्याचा प्रकार.

**-क्रिया**-स्त्री., ( सुवर्णक्रिया ) ( र. २.९८-१०० )
सोन्या संबधीच्या क्रिया.

**-क्षीरी**-स्त्री., भैषज्य० कङ्कुष्ठम् ( चचि. २५.५३; सुचि. ९.१४ ) कंकुष्ठ.
वनस्पति० काञ्चनक्षीरी ( ध. १.२४२ पृ. ५७ )
पिवळा धोत्रा, पिसोळा.

**-गर्भपोटली**-पु., पारदयोग० राजयक्ष्महरः सूतभस्म द्विनिष्कं, स्वर्ण निष्कैकं, गन्धको निष्कद्वयः इत्येतांश्चित्रकक्काथेन मर्दयित्वा शोषयित्वा च वराटान्पूरयेत। ततस्तान् मृत्पात्रे गजपुटे पचेत् ( र. १४.२६-२८ )
**हेमगर्भ**—पाऱ्याचा योग. पाऱ्याचे भस्म, सोने, गंधक क्रमाने दोन एक व दोन प्रमाणात घेऊन चित्रकाच्या काढ्यात खलावे. सुकवावे व कवड्यात भरावे. नंतर त्या मातीच्या भांड्यात गजपुटात पक्व करावे.

**-गौर**-पु. वनस्पति० किङ्किरातः ( ध. ५.१५६; पृ. २०२ )
सुरंगी. सुगंधी वनस्पती.

**-चूर्ण**-न., सुवर्णस्य रजः ( चचि. २३.२३९ )
सोन्याची भुकटी, सोन्याचे पीठ.

**-दुग्ध**-पु., वनस्पति० उदुम्बरः ( ध. ५.८६; पृ. १८६ ) उंबर

**(-दुग्धा)**-स्त्री., वनस्पति० काञ्चनक्षीरी ( ध. १.२४०; पृ. ५६; अहृसू. १५.२ )
पिवळा धोतरा, पिसोळा.

**(-दुग्धी)** स्त्री., वनस्पति० काञ्चनक्षीरी ( रा. ५.३६५; पृ. ५७ )
पिवळा धोतरा.

**-प**-वि., हेमसेवी नाम हेमचूर्णं सानुपानं पिबन्तीति ( चचि. २३.२४०; अहृसू. ७.२८ )
सोन्याचे चूर्ण वा भस्म अनुपानाबरोबर पिणारा. किंवा तापवून लाल केलेले सोने पाण्यात विझवून ते पाणी पिणारा.

**-पात्र**-न., सुवर्णभाण्डम् ( असंसू. १०.३६ )
सोन्याचे भांडे.

**-पादी**-स्त्री., वनस्पति० हंसपादी ( रा. ५.१६६; पृ. १५६ )
राजहंस.

**-पुष्प**-पु., वनस्पति० चम्पकः (ध.५.१४२; पृ.१९९)
चाफा.
**अशोकः** ( रा. १०.२७२, पृ. २०३ ) अशोक.
**आरग्वधः** ( रा. ९.३३३; पृ. ५२ ) बहावा.
**आहुल्यम्** ( रापरि. ४.३४; पृ. ३३७ )
तरवडा, तरोटा.

**-पुष्पक**-पु., वनस्पति० लोध्रः ( रा. ६.२३९; पृ.१२९ ) रोध्र.

**-पुष्पी**-स्त्री., वनस्पति० हेमा ( रापरि. ३.१४; पृ. ३३० )
पिवळ्या फुलांची पिवळी वनस्पती.
**स्वर्णुली** ( रापरि. ४.३०; पृ. ३३७ )
पिवळ्या फुलांची वनस्पती.
**मुसलीकन्दः** ( रापरि. ७.५८; पृ. ३५२ ) मुसळी.
**इन्द्रवारुणी** ( रा. ३.३७२; पृ. ५८ )
कवंडळ, कडु इंद्रावण.

**-फला**-स्त्री., वनस्पति० सुवर्णकदली ( रा. ११.११५; पृ. १४९ )
सोनकेळ.

**-माक्षिक**-पु., न., खनिज० सुवर्णमाक्षिकम् (र. २.८२; ध. ३.१४८; पृ. १२४) द्र० **'माक्षिक'**
सुवर्णमाक्षिक.

**-यूथिका**-स्त्री., वनस्पति० यूथिकाभेदः द्र० 'यूथिका' ( रा. १०.१५१; पृ. २०० )
सोनजुई.

**-रक्ती**-स्त्री., वरलोहेन रक्तीकृतं स्वर्णं हेमरक्ती इति कीर्तितम् ताररक्ती अपि हेमरक्तीवन्निर्मीयते (र. ८.१२)
वरलोह तयार करून त्याच्या सहाय्याने सुवर्ण तांबडे केले की त्याला हेमरक्ती म्हणतात. ताररक्ती ही अशीच करता येते.

**-लता**-स्त्री., वनस्पति० हेमा (रापरि. ३.१४; पृ. ३३०)
पिवळ्या फुलांची पिवळी वेल.

**-वती**-स्त्री., वनस्पति० हेमा (रापरि. ३.१३; पृ. ३३०)
पिवळ्या फुलांची पिवळी वनस्पती.

**-वर्णवती**-स्त्री., वनस्पति० दारुहरिद्रा (ध. १.५९; पृ. १८)
दारुदळद.

**-वल्ली**-स्त्री., वनस्पति० हेमा (रापरि. ३.१४; पृ. ३३०)
पिवळ्या फुलांची पिवळी वनस्पती.

**-विमल**-पु., खनिज० विमलः (धपरि. ६.७; पृ. २९०)
सुवर्ण विमल. सुवर्णमाक्षिकाचा प्रकार.

**हेमन्**-न., खनिज० सुवर्णम् (चचि. १.(३)-२३) सोने.
वनस्पति० नागकेशरम् (चसू. ३.२९) नागकेशर.
पद्मकम् (असंउसू. ३०) पद्मकाष्ठ.
धत्तूरः (र. २७.१३) धोतरा.

**हेमन्त**-पु., ऋतु० शीतलक्षणः ऋतुः (चसू. ६.४)
हेमन्ते आचरणविधिः, बलिनो जाठराग्निः हेमन्ते शीतसंरोधात्प्रबलो भवति। स वायुना ईरितः अल्पेन्धनो धातून्पचेत्। अतः हेमन्ते स्वाद्वम्ल-लवणान् रसान् सेवेत। हेमन्ते निशानां दैर्घ्यात् मनुष्यः प्रातरेव बुभुक्षितोऽस्ति। तस्मात् मूत्रोत्सर्गादिकमवश्यं कार्यं संभाव्य यथोक्तं वातघ्नतैलैरभ्यङ्गं, मूर्ध्नि तैलविमर्दनं, कुशलैः सार्धं नियुद्धं युक्तितः पादाघातं चानुशीलयेत्। ततः कषायापहृतस्नेही यथाविधिस्नातः, सदर्पेण कुङ्कुमेन प्रदिग्धोऽगुरुधूपितश्च स्निग्धान् रसान् पलं पुष्टं, गौडं, मद्यं, मदिरामच्छसुरां च भजेत्। तथैव गोधूमपिष्टमाषेक्षुक्षीरोत्थविकृतीः शुभाः भजेत्। नवमन्नं वसां तैलं च सेवेत। शौचकार्ये सुखोदकं भजेत्। प्रावराजिनकौशेयप्रवेणीकौचवास्तृतं शयनं, लघुभिरुष्णस्वभावैः रोमशिकारल्लीकाप्रायैः प्रावृतः सन् भजेत्। तथैव युक्त्यार्ककिरणान् स्वेदं भजेत् सर्वदा च पादत्राणम्। अङ्गारतापसंतप्तगर्भभूवेश्मचारिणः शीतपारुष्यजनितो दोषो न जातु जायते (अहृसू. ३.७-१६; सुउ. ६४.२३-२७)
हेमंत ऋतु. थंडी असलेला ऋतु. **आचरण विधी**-थंडीने त्वचेची स्रोतसे रुद्ध झाल्यामुळे बलवान मनुष्याचा अग्नि प्रबल होतो. त्याला योग्य प्रमाणात आहार मिळाला नाही, कमी मिळाला तर वाताने प्रक्षुब्ध होऊन धातूंना पचवतो, म्हणून हेमंतात गोड, आंबट, खारट रसांचे सेवन करावे. हेमंतात रात्री मोठ्या असतात म्हणून सकाळी उठताच भूक लागते. म्हणून शौच मुखमार्जन करून शास्त्रोक्त वातनाशक तेलाचा अभ्यंग व डोक्याला मर्दन करून, निष्णाताशी कुस्ती करून जपून अंग पायांनी चेपून घ्यावे. नंतर तुरट सुगंधी उटणे लावून तेलकटपणा नाहीसा करून स्नान योग्य विधीने करावे. नंतर कस्तुरीयुक्त केशराचे उटणे पुन्हा लावून अगरूची धुरी घेऊन स्निग्ध मांस रस, पुष्ट प्राण्यांचे मांस, गूळ साखरेचे पदार्थ, मध, तसेच गहू, उडीद, ऊस, दूध यांचे पदार्थ, नवे धान्य, वसा, तेल आहारात घ्यावे. हातपाय धुण्याकरिता स्वच्छतेकरिता कोमट पाणी वापरावे; कापसाचे धागेदार असलेले, मऊ कातड्याचे, रेशमी मेंढ्याच्या व हरणाच्या केसांचे वस्त्र आंथरून त्यावर झोपावे. हलके, उष्ण स्वभावाचे कांबळा व केसाळ असे पांघरूण उपयोगात आणावे, शेकावे, अंगावर वस्त्र घेऊन उन्हात बसावे. पायात नेहमी पायतण असावे, निखाऱ्यांनी तापलेले घर तळघर यात असावे म्हणजे थंडीच्या रखरखीतपणाचे दोष बाधत नाहीत.

**हेमाङ्ग**-न., खनिज० सुवर्णमाक्षिकम् (र. १७.६७-६८)
द्र० 'माक्षिक'
सुवर्णमाक्षिक.

**हेमाङ्गत्वच्**-स्त्री., चम्पकत्वक् (सुचि. २५.३९)
सोनचाफ्याची साल.

**हेमाद्रि**-पु., वाग्भटकृताष्टाङ्गहृदयस्य टीकाकारः, अनेनाष्टाङ्गहृदयस्यायुर्वेदरसायननाम्नी टीका चिरचिता (अहृसू. १)

